श्रीगुरुः शरणम्।

श्री.प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृतम्

# श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री)

सटीक मराठी अनुवादासहित.

अनुवादक/संपादक

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख.

श्रीगुरुः शरणम्।

श्री.प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृतम्

# श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री)

सटीक मराठी अनुवादासहित.

अनुवादक/संपादक

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख.

श्रीगुरुः शरणम्।

श्री.प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृतम्

# श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री)

सटीक मराठी अनुवादासहित.

अनुवादक/संपादक

**डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख.**

**पहिली आवृत्ती ---------**

**प्रकाशक :**

१. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा.

२. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती स्वामिमहाराज व श्री. लोकनाथतीर्थ स्वामिमहाराज ट्रस्ट, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

३. श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, नारेश्वर, पोस्ट सायर, व्हाया अंकलेश्वर, जि.वडोदरा ३९३१०७.



**मुद्रक**

के. जोशी आणि कंपनी
सदाशिव पेठ, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी - ०२०-२४४७१४०९
kjoshipress@gmail.com

संपादक.

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख,ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध, पुणे ४११००७.

**प्राप्तिस्थान**

श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

**मूल्य - रु. २००/-**

।। श्रीगुरुः शरणम् ।।





मला द्विसाहस्री ग्रंथाची उपासना देणाऱ्या

सद्गुरु प.पू.योगिराज वा.द.गुळवणीमहाराज

आणि त्या ग्रंथांत प्रवेश करविणाऱ्या प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर

यांच्या चरणकमलीं समर्पित

(पू.डॉ.धीरूभाई जोशी, अध्यक्ष, श्रीवासुदेवप्रबोधिनी व प्रमुख विश्वस्त श्रीअवधूतनिवास ट्रस्ट,

वडोदरा यांचा आशीर्वाद.)

## अस्मदीयम्।

'द्विसाहस्री गुरुचरितम्' लोके ऱ्हस्वत्वात् शीघ्रफलदत्वाच्च प्रियं तथा विद्वत्सु साहित्यिकगुणत्वादुत्कृष्टटीकोपेतत्वादतीव संमान्यम्। अतः तद्ग्रन्थस्य लौकिकभाषायामनेकभाषान्तराणि जातानि।

अयं ग्रन्थोऽपि तद्वन्महाराष्ट्रभाषायां परिवृत्तोऽस्ति। तस्यानुवादकोऽपि डॉ. वा. व्यं. देशमुखो भक्तहृदयः, संस्कृत-प्राकृतभाषानिष्णातोऽस्ति लोके लब्धप्रतिष्ठितः। विशेषतः ब्रह्मलीनो ब्रह्मश्रीकवीश्वरशास्त्रिपदानुरागी तथा च तत्कृपालब्धो वर्तते। अतोऽस्य ग्रन्थस्य महिमा।

प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीमहाराजैरनेकग्रन्थान् रचितान्। 'प्रबोधिनी' तेषां भक्तजनमध्ये प्रसारकार्यं करोति। अद्य स्वामिसमाधीशताब्दिवर्षेऽयं ग्रन्थः प्रकाश्यते। तत्समीचीनं प्रशस्यं च। तदुपरि स्वामिमहाराजचरणानां शुभाशीर्वादाः सन्तु। भक्तजनेषु तत्प्रियतमो भवत्विति मे शुभाशा।

तत्प्रकाशने यैः प्रयत्नशीलैः यद्यत्सकार्यं कृतमस्ति तत्तत्तु सर्वथाऽभिनन्दनीयमस्ति। अस्य द्वितीयावृत्तिः शीघ्रं प्रकाशं पश्यतु।

भवदीयो

**हरिप्रसादः (धीरूभाई) जोशी.**

# प्रस्तावना.

**।। श्रीगुरुः शरणं मम।।**

सद्गुरु भगवान श्रीदत्तात्रेय का आविर्भाव बोध-अवतार रूप होने के प्रतिपादन से ही 'श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)' ग्रंथ का आरंभ होता है। उसी क्रम में श्री श्रीपादश्रीवल्लभ एवं श्री नरसिंह सरस्वती सद्गुरु की बोध-अवतार रूप में लीलाएँ हुई हैं। उसी क्रम में प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजश्री के बोध-अवतारकृत्य स्वरूप लीलाओं का विशद निरूपण पूजनीय श्री रङ्ग अवधूत महाराजश्री विरचित त्रिकाण्डात्मक वरद ग्रन्थ 'श्रीगुरुलीलामृत' के उपासनाकाण्ड एवं उन के अनुपम स्तोत्र 'श्रीवासुदेवनामसुधास्तोत्र' में दृष्टव्य है।

१) **तत्त्वज्ञानमुपादिश्य**... अर्थात् उन्हों ने माता (पूजनीया रमामाई) व पत्नी (पूजनीया अन्नपूर्णा माता) को तत्त्वज्ञान का उपदेश दिया... (श्लोक १९).

२) **भाष्यादि श्रावयामास**....जालवण (गांव) में भाविक भक्तों को भाष्य का श्रवण कराया.(श्लोक २६).

३) **योऽधिकारभिदा ग्रन्थान् रचयित्वा सुबोधकान्। उद्दधार भवे मग्नान् वासुदेव नमोऽस्तु ते।।५०।।** अर्थात् जिन्हों ने भवसागर में मग्न=रममाण लोगों का उद्धार करने के लिए उन के अधिकार भेद के अनुसार (अनेक) सुबोध व सरल=सुबोधात्मक ग्रंथों की रचना की।

पूजनीय स्वामी महाराज विरचित सद्बोधात्मक ग्रन्थों की सूची में श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री) ग्रन्थ अपने रचनास्वरूप वैशिष्ट्य एवं निरूपण रीति वैशिष्ट्य के उपरान्त औपासनिक उपादेयता वैशिष्ट्य से अनुपम वरद ग्रन्थ है।

ग्रन्थ श्रीगुरुतत्त्व-विमर्शात्मक है। गुरुतत्त्व ही मानवी साधना का चरम लक्ष्य व परम प्राप्तव्य है। श्रीगुरुतत्त्व अखण्ड आनन्द एकरस ज्ञानस्वरूप अर्थात् तत्त्वतः निर्विशेष - निर्गुण परब्रह्म स्वरूप होते हुए भी श्रीपादश्रीवल्लभ एवं नरसिंह सरस्वती अपने संन्यासी चरित द्वारा प्रत्यक्ष रूप में अपने भक्त उपासकों को दिव्यमन्त्र व अभीष्टफलप्रदान रूप अनुग्रह करते हैं। अतः श्रीगुरुराज सविशेष-निर्विशेष = सगुण-निर्गुण दोनों रूपों में उपास्य परब्रह्म हैं। मन्त्र ही देवस्वरूप है, इस सिद्धान्त के अनुसार प्रस्तुत ग्रन्थ सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय स्वरूपभूत श्रीश्रीपादश्रीवल्लभ-श्रीनरसिंह सरस्वती सद्गुरु अभिन्न मन्त्रमय ग्रन्थ है। स्वभक्त अभीष्ट प्रदानात्मक है, यथा :- **मुमुक्षुभेषजं मुक्तजीवनं विषयीष्टदम्। श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वात् वच्मि तेऽल्पकम्।।(३:९).** स्वोपज्ञ टीका में भगवान ग्रन्थकार कहते हैं, 'श्रीसद्गुरु का चरित्र (यद्यपि हृदय व वाणी से अत्यन्त दूर - अगम्य है, तथापि मैं तुम्हें थोडा सा कहता हूँ) विषयी जनों को अभीष्ट (अर्थ-काम) प्रदान करने वाला, मुमुक्षु भक्तो को संसार-रोग निवारक औषध और मुक्तों को निरुपम आह्लाद-जीवनभूत, कृतघ्नत्वनिवृत्ति रूप जीवनसाफल्य प्रदान करनेवाला है।'

यद्यपि सकल अभीष्ट अर्थ प्रदान करने वाली अनेक मन्त्र उपासनाएँ विभिन्न तन्त्र ग्रन्थों में प्रसिद्ध हैं, तथापि वे प्रायः शापित होने से, उनका प्रभाव कीलकत्व से प्रतिबद्ध होने के कारण शापविमोचन, उत्कीलन, आवरणपूजा, बलिदान आदि में थोडा सा भी वैगुण्य आने से उपासना का फल प्राप्त नही होता है। प्रस्तुत उपासना ग्रन्थ (और पूरी श्रीदत्तात्रेय उपासना प्रणाली) में कहीं किसी शापजनित प्रतिबद्धता न होने से यह समग्र उपासना अनायास फलदायी होने का प्रतिपादन भगवान ग्रन्थकार ने किया है। अतः अनायास फलप्राप्ति प्रस्तुत ग्रन्थ-उपासना का एक वैशिष्ट्य है।

श्रीगुरुचरितम्(द्विसाहस्री) स्वयं मन्त्रमय उपासना ग्रन्थ है और उस पर लिखी गई स्वोपज्ञ संस्कृत टीका अपने आप में एक स्वतन्त्र ग्रन्थ है, वस्तुतः ये दो ग्रन्थ हैं। दोनों की संस्कृत भाषा अत्यन्त प्राञ्जल है। मराठी भाषा में यह

ग्रन्थराज अनुवाद के रूप में पहले सी ही प्राप्त है। गुजराती व हिन्दी में भी ग्रन्थ का अनुवाद उपलब्ध है। यहाँ प्रस्तुत ग्रन्थ में विद्वान्, अनन्य उपासक व अनुग्रहीत भक्त अनुवादकजी ने प्रत्येक श्लोक का अन्वय, श्लोकार्थ एवं स्वोपज्ञ टीका पर आधारित विशद विवरण दे कर उपासक भक्तों के लिए एक सहायक मार्गदर्शक ग्रन्थ प्रदान किया है।

अनुवादक डॉ.श्री वासुदेव व्यं. देशमुखजी मूलतः चिकित्साशास्त्र की पॅथॉलोजी विद्या शाखा के गणमान्य अभ्यासी व प्राध्यापक, अनुसन्धानकर्ता के रूप में सर्विस प्रदान करने के बाद ऐच्छिक निवृत्त जीवन अध्यात्म मार्ग में व्यतीत कर रहे हैं। अपने कार्यक्षेत्र में सफल सिद्धि प्राप्त करने के साथ आपने प.पू. योगिराज श्रीगुळवणी महाराजश्री से अनुग्रहित हो कर, प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वरजी के सान्निध्य में रह कर जो आध्यात्मिक सिद्धि प्राप्त की है, उसका स्पष्ट प्रतिबिम्ब उनके व्यक्तित्व, कर्तृत्व में दृष्टिगोचर होता है। कम्प्युटर सिद्धिद्वारा उन्हों ने भक्तसमुदाय के लिए जो कार्य किया है वह अपने आप में अप्रतिम है।

सम्प्रति पूजनीय स्वामी महाराजश्री के समाधि शताब्दि वर्ष में प्रस्तुत ग्रन्थ एक सम्मान्य अनुवादक की साधना के फलस्वरूप विशाल जनसमाज को प्राप्त हो रहा है। सम्माननीय डॉ.श्री देशमुखजी एवं सम्माननीय प्रकाशन व्यवस्था का अभिवादन करते हुए मैं आनन्द और धन्यता का अनुभव करता हूँ।

**।। प्रीयतां अनेन सद्गुरु भगवान श्री रङ्गावधूतः इति।।**

**वल्लभविद्यानगर** **शास्त्री जयेन्द्र दवे**

**गुरुपौर्णिमा दिनांक २२/७/२०१३, सोमवार**

**श्रीगुरुः शरणम्।**

**श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री संहिता)**

# ग्रंथप्रवेश.

**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नमम्बासुतः स्तुतः। गन्धर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि।।**

**नमस्ते शारदे देवि वीणावादनतत्परे। सरस्वती जगन्माता सा मे बुद्धिं प्रचोदयात्।।**

**वासुदेवयतिं वन्दे वामनं मम सद्गुरुम्। कवीश्वरं च दत्ताख्यं याचे मतिप्रकाशनम्।।**

**वाङ्मयं वासुदेवस्य गहनं सागरादपि। चिंतनाय प्रवृत्तोऽस्मि मंदोऽप्यंतरशुद्धये।।४।।**

## श्रीगुरुचरित्र.

चौदाव्या शतकांत परधर्मीयांच्या आक्रमणांनी दक्षिण भारत व्यापून टाकला. बहामनी राजवटीने याच काळांत आपला जम बसविला होता. आक्रमणाला राजकीय आणि धार्मिक अशी दोन्ही अंगे होती. सनातन वैदिक धर्माच्या मुळावरच घाव बसत होते. धर्माचे आचरण, धर्माची मूलतत्त्वे आणि परंपरा या सर्वांनाच ग्लानि आली होती. एकीकडे हिंदू राजांची सत्ता कोलमडत होती तर दुसरीकडे समाजाला धर्माचे मार्गदर्शन करणारा ब्राह्मणवर्गच आचारभ्रष्ट होऊं लागला होता. *'यदा यदा हि धर्मस्य..'* या गीतावचनानुसार ईश्वरी अवतार प्रकट झाले. प्रथम आंध्र प्रदेशांत पूर्वसागराच्या जवळ पीठापूर येथे आचाराने आणि ऐहिक समृद्धीने संपन्न अशा ब्राह्मण कुळांत श्रीपादश्रीवल्लभ यांचा अवतार झाला. हाच श्रीदत्तात्रेयप्रभूंचा कलियुगांतील पहिला अवतार मानला जातो. श्रीपादश्रीवल्लभांच्या नंतर कांही दशकांत (इ.स. १३७८) श्रीदत्तप्रभूंचा द्वितीय अवतार श्रीनृसिंहसरस्वती यांचा जन्म झाला. या दोन्ही अवतारांचे कार्य परस्परपूरक असे झाले आहे.

यांनी हिंदू समाजाच्या सर्व घटकांच्या धार्मिक श्रद्धा तर दृढ केल्याच, पण तत्कालीन मुसलमान समाजावरही त्यांचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः ब्राह्मण समाजाला त्यांच्या धार्मिक जबाबदाऱ्यांची जाणीव करून देऊन आणि त्यांच्यात *'धर्मो रक्षति रक्षितः'* हा आत्मविश्वास निर्माण करून मुसलमानी धर्माच्या आक्रमणाला आळा घातला. या दोन महान विभूतींचे कार्य ज्ञानेश्वर-नामदेव आदि समकालीन आणि एकनाथ-तुकाराम आदि आगामी साधुसंतांच्या कार्याला पूरक असेच झाले आहे. संत एकनाथमहाराजांचे सद्गुरु संत जनार्दनस्वामी हे श्रीनृसिंहसरस्वतींचे शिष्यच होते.

या दोन अवतारांचे, मुख्यतः श्रीनृसिंहसरस्वतींचे चरित्र हा श्रीगुरुचरित्राचा विषय आहे. श्रीगुरुचरित्राचे लेखक सरस्वती गंगाधर साखरे हे कर्नाटकांतील कडगंची (उत्तरकांची) ह्या गांवचे. त्यांचे वडील गंगाधर यांचे पणजोबा सायंदेव साखरे हे श्रीनृसिंहसरस्वतींच्या प्रमुख शिष्यांत गणले जातात. लेखकाने आपल्याला 'महाराष्ट्र भाषा' येत नाही असे म्हटले असले तरी या ग्रंथाच्या व्युत्पन्न भाषेवरून तो त्यांचा विनयच आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. ह्या ग्रंथांत एकही यावनी भाषेचा शब्द आलेला नाही हे एक वैशिष्ट्य आहे. मराठीचे आद्यकवि मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'चा प्रभाव या ग्रंथांत कांही ठिकाणी आढळतो. श्रीनृसिंहसरस्वतींचे आपण 'नामधारक' आहोंत असे सांगून हे चरित्र आपल्याला श्रीनृसिंहसरस्वतींचे संन्यासी शिष्य श्रीसिद्धसरस्वती यांनी सांगितले असे ते म्हणतात. हा ग्रंथ सिद्ध आणि नामधारक यांच्यांतील संवादरूपच आहे. श्रीनृसिंहसरस्वतींच्या जीवनांतील घटना मांडणे एवढेच या ग्रंथाचे प्रयोजन नाही तर त्यांनी पुनरुज्जीवित केलेल्या वैदिक धर्माची शिकवण, आचार आणि संस्कार यांचीही सविस्तर मांडणी त्यांत केली आहे. सरस्वती गंगाधरांचा वेद, स्मृती आणि पुराणे यांचा सखोल व्यासंग त्यांतून स्पष्टपणे दृग्गोचर होतो. हा ग्रंथ पुराणाच्या धाटणीने लिहिला आहे. आख्याने आणि उपाख्याने यांचे प्रसंगाने निवेदन आहे आणि त्यांतून मुख्यतः वर्णाश्रमधर्माची मूलतत्त्वे, उपासनापद्धति आणि आचार यांचे प्रतिपादन आहे. दत्तसंप्रदायाचे आणि त्यांतील श्रीगुरुभक्तीचे माहात्म्य विशेषत्वाने वर्णिले आहे. सरस्वती गंगाधरांची ओंवी बऱ्याच वेळां गद्यप्राय वाटते

आणि शब्दांचे लालित्य हे तिचे वैशिष्ट्य नाही. पण प्रसंगोचित साहित्यांतील नवरसांचा आविष्कार त्यांत आहे तसेच अर्थालंकारांचीही समर्पक योजना केलेली आहे.

अर्थात साहित्यगुणांुळे हा ग्रंथ लोकप्रिय झाला असे नाही. ह्या ग्रंथांची प्रासादिकता - ईश्वराचा प्रसाद प्राप्त करून देण्याची क्षमता, विलक्षण आहे. प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आपल्या द्विसाहस्री ग्रंथाच्या उपसंहारांत या ग्रंथाचे वर्णन असे करतात. **'तत्संवादमयं ग्रंथं धर्म्यं गंगाधरात्मजः। सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत् तारकं सुधीः। यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूतरक्षामुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः। सप्ताहं तत्पाठिते शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति।।(२३ः११६-११७)** सिद्धमुनी आणि सरस्वती यांच्या संवादात्मक हा ग्रंथ जिथे कुठे नुसता ठेवलेला असला तरी भूत-प्रेत-पिशाचादि दुष्ट शक्तींचा नाश करतो. याचें सप्ताह पठण किंवा श्रवणही केले असतां दत्तात्रेय भगवान अभीष्ट कामना पुरवतात. इ.स. १४३८ च्या आसपास सिद्ध झालेल्या ह्या ग्रंथाची पारायणे असंख्य भक्तांनी करून आपले इष्ट प्राप्त करून घेतले आहे. आणि आजही करीत आहेत. साहजिकच दत्तसंप्रदायांत या ग्रंथाला वेदतुल्य मान आहे. ह्या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी वेदमंत्र उद्धृत केले असल्याने मुंज झालेल्या ब्राह्मणालाच हा वाचतां येतो. पण इतरांना हा ऐकतां येतो. स्त्रियांना हा ग्रंथ पठण करतां येत नाही; पण त्यांना तो ऐकतां येतो. या ग्रंथाला प्रदक्षिणा घालूनही याच्या प्रसादाचा लाभ अनेक स्त्रियांनी घेतला आहे आणि घेत आहेत.

### प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती यांचा पहिला ग्रंथ.

कदाचित् याच कारणामुळे ह्या ग्रंथांतील लौकिक आशयाकडे दुर्लक्ष झाले असावे. केवळ साहित्यकृती म्हणून किंवा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून याचे समीक्षण अलीकडेच झाले आहे. अर्वाचीन (१८५४ - १९१४) दत्तावतार मानले जाणारे महान संत प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांनी या ग्रंथावर संस्कृत आणि प्राकृत रचना करून त्यांतील धार्मिक प्रतिपादनांचे, तात्त्विक प्रमेयांचे आणि श्रीगुरूंच्या लीलांचे विवरण केले आहे. त्यांतून या ग्रंथाचे

वैदिक संप्रदायाशी असलेले दृढ नाते स्पष्ट करून त्याचे श्रुति-स्मृति-पुराणांच्या परंपरेतील स्थान विशद केले आहे. तसेच भागवत संप्रदाय आणि श्रीमच्छंकराचार्यांचा अद्वैत संप्रदाय यांच्याशी असलेल्या दत्तसंप्रदायाच्या अतूट संबंधाचेही दिग्दर्शन केले आहे.

या ग्रंथांपैकी सर्वांत प्रथम झालेला ग्रंथ म्हणजेच 'श्रीगुरुचरितम्'. माणगांवला असतांना (इ.स. १८८४) श्रीदत्तप्रभूंची श्रीवासुदेवशास्त्रींना (प.प. टेंबे स्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमींचे नांव) संस्कृतमध्ये गुरुचरित्र लिहिण्याची दत्तप्रभूंची आज्ञा झाली. त्या वेळी शास्त्रीबुवांचे संस्कृत अध्ययन माणगांवांतच अगदी जुजबी झाले होते. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे संस्कृत भाषांतर आपल्याला कसें जमणार?' असा विचार बुवांच्या मनांत आलाही; पण 'लिहायला आरंभ करा,' अशी दत्तप्रभूंची आज्ञा झाली. आश्चर्य म्हणजे ग्रंथ अवघ्या बारा दिवसांत लिहूनही झाला. ह्या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना शास्त्रीबुवांचे एक भक्त सावंतवाडीचे नारोपंत यांनी ते लेखन पाहिले. ते बुवांपेक्षा वयाने वडील असून त्यांनी बुवांना लहानपणापासून पाहिले होते. त्यांनी बुवांना विचारले की, 'बुवा! तुमचे संस्कृतचे फारसे अध्ययन नसतांनाही ही संस्कृत काव्यरचना कशी करूं शकतां?' त्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, 'मी कुठे हा ग्रंथ लिहितो? मला जशी अक्षरे दिसतात तशींच मी कागदावर उतरून काढतो.' यावरून सहजच असे अनुमान निघते की हा ग्रंथ अपौरुषेय असून श्रीस्वामीमहाराज हे त्याचे द्रष्टे आहेत.

वर सांगितल्याप्रमाणे अवघ्या बारा दिवसांत ग्रंथ पूर्ण झाल्यावर शास्त्रीबुवांच्या कानांवर 'संहितेयं द्विसाहस्री' असे श्रीदत्तगुरूंचे शब्द कानांवर पडले. तेव्हां कुतूहलाने ग्रंथाचे श्लोक मोजून पाहतां ती संख्या दोन हजारांपेक्षां बरीच कमी भरली. 'श्रीदत्तप्रभूंचे सांगणे कसे चुकेल?' असा विचार करून बुवांनी दुर्गासप्तशतीच्या गणनेप्रमाणे अर्धश्लोक, उवाच हेही त्यांत मोजल्यावर संख्या बरोबर दोन हजार भरली. तेव्हांपासूनच या ग्रंथाला 'द्विसाहस्री' या नांवानेच सर्व ओळखूं लागले. हा ग्रंथ मंत्रात्मक असल्याची ती साक्षच होती. नंतर तो ग्रंथ वाचून पाहतांना बुवांना त्यांत व्याकरणाचे वगैरे

कांही दोष वाटले म्हणून ते दुरुस्त करण्यासाठी लेखणी उचलली तेव्हां, 'हे झाले आहे तसेच मला आवडले आहे. त्यांत बदल करू नये. शिवाय अन्य व्याकरणानुसार (पाणिनीव्यतिरिक्त) ते शुद्धच आहे.' अशी स्पष्ट आज्ञा झाली. तेव्हां महाराजांनी तो ग्रंथ तसाच ठेवला. या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी प्राचीन चांद्र व्याकरणाचे प्रयोग आढळतात. दत्तप्रभूंनी ते मान्य केल्याने साहजिकच हे आर्ष प्रयोग ठरतात.

अर्थात श्रीगुरुचरित्राच्या तुलनेत हे संक्षिप्त भाषांतर काव्यगुणांत खूप सरस आहे. विविध वृत्तांतून रसपोष करण्याची श्रीस्वामिमहाराजांची हातोटी विलक्षण आहे. यमक, प्रास (उदा. शिष्टं कुष्टं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः।) आदि शब्दालंकार विपुल आहेत. भक्ति किंवा शांत रस हा जरी प्रधान रस असला तरी प्रसंगानुसार करुण, हास्य आदि रसांचीही योजना केली आहे. बावीसाव्या अध्यायांत शेत कापणाऱ्या पतीला अडविणाऱ्या स्त्रीला तो मारायला धावतो तेव्हां ती पळतांना तिच्या पायांखालची माती केसांचे चूर्ण झाली (निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत्।।) असे विनोदी चित्र ते उभे करतात. सोळाव्या अध्यायांतील सावित्रीच्या विलापांतील करुणरस हृदयस्पर्शी आहे. बऱ्याच ठिकाणी अर्थांतरन्यासांतून सुभाषिते पेरण्याचे कौशल्य दिसून येते. उदा. 'लोकाः स्वकर्मसूत्रोथा वृथाहंकारसंश्रिताः।।', 'मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भिषजे गुरौ यादृशी भावना यस्य सिद्धिस्तु तादृशी।।', 'लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः' इत्यादि.

## द्विसाहस्रीची रचना.

मूळ गुरुचरित्रांत ५२ अध्याय (अवतरणिका धरून) व ७३०० हून अधिक श्लोक आहेत. द्विसाहस्रीत तेवीस अध्याय आहेत. अर्थात संस्कृत भाषेच्या वैशिष्टयामुळें कमीत कमी शब्दांत अधिकांत अधिक आशय मांडण्यांत श्रीस्वामी महाराज यशस्वी झाले आहेत. त्यांनी एकाक्षरी कोशाचाही सढळ हाताने उपयोग केलेला दिसतो. यांतही चौथ्या अध्यायांत मूळ गुरुचरित्रांत नसलेला यदु, प्रह्लाद आणि कार्तवीर्य यांना केलेला उपदेश आहे. श्रीस्वामीहाराज

स्वतःच या अध्यायाला 'क्षेपक' अध्याय म्हणतात. या तेवीस अध्यायांखेरीज द्विसाहस्रींत आरंभीं १११ श्लोकांची श्रीगुरुस्तुति आहे. मूळ गुरुचरित्रात दत्तात्रेय देवतेचे स्वरूप, त्यांच्या उपासनापद्धति आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये ह्यांचा फारसा विचार केलेला नाही. ह्या प्रकरणांत श्रीमहाराजांनी दत्तात्रेय, त्यांचे स्वरूप, त्यांची उपासना, त्यांची सर्वसुलभता इत्यादींचे विवरण केले आहे. ग्रंथाच्या शेवटी दत्तसंप्रदायाचे वैशिष्ट्य मानल्या गेलेल्या अष्टांगयोगाच्या दिग्दर्शनासाठी योगरहस्य, तसेच शांकर अद्वैताच्या मांडणीसाठी बोधरहस्य ही दोन प्रकरणे जोडली आहेत. ही द्विसाहस्रीची रचना दुर्गासप्तशतीच्या रचनेसारखीच आहे. वर निर्देश केल्याप्रमाणे गणना करितां सातशें श्लोक आणि तीन रहस्ये दुर्गासप्तशतीत दिसून येतात.

## त्रिकांडात्मक रचना

वैदिक परंपरेला अनुसरून भगवद्गीतेप्रमाणे गुरुचरित्राचीही रचना ज्ञान, कर्म आणि उपासना अशी त्रिकांडात्मक आहे हे श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्रीची रचना तशी केल्यावरच इतर अभ्यासकांच्या ध्यानांत आले. श्रीमहाराज टीकेच्या समारोपांत स्वतःच म्हणतात, **'ज्ञानं त्रयोदशाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः। पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट्।।'** पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोग, नंतरच्या पांच अध्यायांत कर्मयोग आणि शेवटच्या पांच अध्यायांत भक्तियोग अशी रचना योगिराज दत्तप्रभूंनी करविली. यानुसार श्रीगुरुचरित्राची रचना पाहतां अध्याय २४ पर्यंत ज्ञानकांड, ३७ पर्यंत कर्मकांड आणि ५१ पर्यंत भक्तिकांड अशी होते. श्रीगुरुसंहिता (समश्लोकी) या आपल्या ग्रंथांत श्रीस्वामीमहाराजांनी अशीच योजना केली आहे.

## द्विसाहस्रीची टीका.

मूळ द्विसाहस्री वर सांगितल्याप्रमाणे गृहस्थाश्रमांत इ.स. १८८४ त लिहून झाली. १८९१ साली पत्नीच्या मृत्यूनंतर वयाच्या ३५ व्या वर्षी गंगाखेड येथे वासुदेवशास्त्रींनी संन्यास घेतला. १८९८ साली चिखलदा येथे आठवा चातुर्मास

करून श्रीस्वामीमहाराज प्रभासपट्टण येथे आले असतां त्यांना दत्तप्रभूंची द्विसाहस्रीवर टीका लिहिण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे पंधरा वर्षांनंतर आपल्या ग्रंथावर स्वामीमहाराजांनी स्वतःच टीका (याला स्वोपज्ञ टीका म्हणतात) लिहिण्यास आरंभ केला. मूळ ग्रंथ या वेळी समोर नव्हता. तरी केवळ स्मरण करूनच या टीकेचे लेखन झाले हे विशेष होय. ही टीका द्वारकेत श्रीमहाराजांच्या आठव्या चातुर्मासांत पूर्ण झाली. यासंबंधी प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात, 'समष्ट्यात्मक भगवत्स्वरूपाशी संलग्न झालेल्या सत्पुरुषांच्या विशालबुद्धीला अगम्य असें कांहीच नाही.' श्रीस्वामीमहाराजांनीच लिहिले आहे कीं नऊ अध्यायांची टीका प्रभास क्षेत्रांत झाली व शेष सर्व अध्यायांची द्वारकेंत झाली. **(पाश्चात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताखिलानां। श्रीद्वारकायां चरितस्य तस्य सद्गुरोर्वेदनुतस्य तस्य॥)** टीकेनंतर या ग्रंथांची चूर्णिका म्हणजे सरल गद्य अनुवादही द्वारकेतच झाला.

**पदच्छेदः पदार्थोक्ति विग्रहो वाक्ययोजना, आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् ॥** या उक्तीप्रमाणे वाक्याची पदें पाडणे, त्यांचा अर्थ सांगणे, संधी सोडवणे, वाक्याचा अर्थ लावणे आणि आक्षेपांचे समाधान करणे ही व्याख्यानाची (टीकेची) पांच लक्षणे आहेत. पण श्रीस्वामीमहाराजांची टीका यांच्याही पुढे जाऊन स्वतंत्र मताचे प्रतिपादनही करते. त्यामुळे ती भाष्य या संज्ञेला पात्र ठरते. **(सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुसारिभिः। स्वपदानि च वर्ण्यते भाष्यं भाष्यविदो विदुः)** ह्या टीकेच्या माध्यमांतून श्रीस्वामी महाराजांनी श्रीगुरुचरित्राचे सिद्धांत स्पष्ट करून त्यांची श्रुति-स्मृति-पुराणांशीं संगति दर्शविली आहे. तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा (वेदांत) या षड्दर्शनांच्या, आणि गुरुचरित्रांतील प्रमेयांची एकवाक्यता विशद केली आहे. गीता-भागवत या ग्रंथांतीलच तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन गुरुचरित्रांत कसे अनुस्यूत आहे तेही स्पष्ट केले आहे. पर्यायाने श्रीदत्तसंप्रदाय हा कसा भागवतसंप्रदायांतच अंतर्भूत आहे तेही दर्शविले आहे. गुरुचरित्रांतील वेदांत हा श्रीमच्छंकराचार्यांच्या अद्वैतमताला कसा अनुसरून आहे हेही श्रीस्वामीमहाराजांनी विशद केले आहे. अर्थातच ही टीका लिहितांना वेदशास्त्रादि १७०हून

अधिक ग्रंथाचे संदर्भ उद्धरणासहित दिलेले आहेत. हे केवळ स्मरणशक्तीच्या आधारेच दिलेले आहेत. 'मूळ गुरुचरित्रांत नसलेले कांही विषय द्विसाहस्रींत आल्याचे वर आपण पाहिलेच आहे. असेच अनेक विषय टीकेंतही श्रीस्वामीमहाराजांनी हाताळलेले आहेत. श्रीगुरुचरण 'प.पू.गुळवणीमहाराजां'नी यांतील कांही उदाहरणे दिली आहेत. 'माया कां मानावी? ईश्वर पक्षपाती आहे काय? जगाचे अस्तित्व व नास्तित्व हे अध्यारोपापवादात्मक कसे आहे? कर्माचा ज्ञानाला कसा उपयोग होतो? कर्माचरण कसे केले असतां चित्त शुद्ध होते? ईश्वरावतारांचे स्वरूप काय व ते कसे होतात? ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांतच गेले पाहिजे किंवा एकदम संन्यासाश्रमांत जातां येईल? संन्यासाश्रम घेतल्यावर शिष्यप्रशिष्यपरंपरा कां चालूं ठेवावी? जीवन्मुक्ताची आंतरस्थिति कशी असते? तीर्थयात्रा कां करावी? सद्गुरुसेवा सर्वांनीच कां करावी? शरीरांतून जीव जातो कां प्राणवायु जातो, शरीरस्थिति मुख्यतः कोणावर अवलंबून आहे? अविद्येपासून उत्पन्न झालेले कर्म तीच अविद्या घालविण्यास कसे कारणीभूत होते? ब्रह्मज्ञानी पुरुषाने कर्म टाकावे काय? एकाच जन्मांत सर्व कर्मफलांचा भोग संपवून मुक्त होणे शक्य आहे काय? पतिपत्नीसंबंध, गुरुशिष्यसंबंध, स्वामिसेवकसंबंध इत्यादि कसे निर्माण होतात व ते कसे दूर होतात? बंधक असलेली काम्यकर्मे वेदांत कां सांगितली? मनुष्य, पितर, देव यांची कालगणना कशी करावी? चंद्रकलांचे स्वरूप काय? गायत्री मंत्राचा अर्थ काय? त्या मंत्राचे इतके महत्त्व कां? आपत्कालांत कसे वागावे? मुख्य ज्ञानयोग व त्याचे साधन कर्मयोग यापेक्षां तिसरा भक्तियोग कशाला पाहिजे? भगवंताकडूनच वेदाज्ञेचे उल्लंघन झाल्यास तें योग्य कां अयोग्य? साकाराच्या भक्तीने मोक्ष कसा मिळेल? शूद्र हा श्रौतविद्येचा अधिकारी आहे कीं नाही? त्याला मुक्ति कशी मिळेल? रोगादि दुःखांचे खरें कारण कोणतें व त्यांचा परिहार कसा होऊं शकेल?'

अशा रीतीने द्विसाहस्री ह्या ग्रंथांत दत्तसंप्रदायाच्या तात्त्विक बैठकीची सप्रमाण संस्थापना झाली आहे. त्याचप्रमाणे दत्तोपासनेच्या विविध परिमाणांचे सूत्रात्मक दिग्दर्शनही आहे. ह्या ग्रंथांत प्रतिपादलेल्या मूलतत्त्वांचाच विस्तार

श्रीमहाराजांनी आपल्या विशाल वाङ्मयांत पुढे केलेला कुणाही विचक्षण वाचकाला दिसून येईल.

**फलश्रुति.**

श्रीगुरुचरित्राची प्रासादिकता आपण वर पाहिलीच आहे. श्रीस्वामीमहाराजांच्यासारख्या अवतारी महात्म्याने श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच केलेल्या ह्या त्याच्या संस्कृत रूपांतरांतही ती प्रासादिकता उतरली असल्यास नवल नाही. ग्रंथाच्या समारोपांत महाराजश्री म्हणतात, ‘ **स एवात्रेयगोत्रोत्थगणेशब्रह्मपुत्रगाः। पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रंथात्मा तारकोऽव्ययः।।** ’ तोच (सरस्वती गंगाधरलिखित) श्रीगुरुचरित्रग्रंथरूपी तारक आणि अव्यय दत्तात्रेय अत्रिगोत्रोत्पन्न गणेशब्राह्मणाच्या पुत्राची वाणी पावन करीत इथे विराजत आहे. श्रीगुरुचरित्राच्या पठणाने वा श्रवणाने होणाऱ्या ऐहिक आणि आमुष्मिक कल्याणाचीच ही ग्वाही आहे. त्यानुसार अनेक दत्तभक्त या ग्रंथाची उपासना करून आपले जीवन कृतार्थ करीत आहेत. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतींच्या प्रश्नावलीत या ग्रंथाची फलश्रुति अशी सांगितली आहे.

**देईल तो इष्टसिद्धी वासुदेव यतीश्वर। ‘द्विसाहस्री’ गुरुकथा सप्ताहें दूर हो दर।।**

श्रीगुरुचरित्राप्रमाणेच या ग्रंथाचेही सप्ताह करून इष्टसिद्धि पावणारे हजारों दत्तभक्त आजही आहेत. ‘केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे।’ या समर्थोक्तीनुसार हा श्रद्धेचा आणि अनुभवाचा विषय आहे.

**द्विसाहस्रीची हवनीयता.**

ह्या ग्रंथाला ‘द्विसाहस्री संहिता’ असे नांव देतांना दत्तप्रभूंनीच हा सामान्य ग्रंथ नसून मंत्रमय संहिता आहे असा संकेत दिलेला दिसतो. अर्थात् त्याकडे श्रीमहाराजांनी (बहुतेक हेतुपुरःसर) दुर्लक्ष केले. यांत त्यांचे अमानित्वच दिसून होते. हे सगळे मान्य करणे म्हणजे स्वतःकडे ऋषित्व घेणे ठरले असते. श्रीमहाराजांच्याकडून ह्या ग्रंथाच्या हवनाचा पुरस्कार होत नाही हे पाहूनच बहुधा दत्तप्रभूंनी महाराजांचे सावंतवाडीचे ऋणानुबंधी व शिष्य आणि महान्

दत्तभक्त श्री. नारोपंत उकिडवे यांना स्वप्नदृष्टांतांत संस्कृत गुरुचरित्राचा स्वाहाकार करण्याची आज्ञा केली. नारोपंतांनी आपली आर्थिक अडचण दत्तप्रभूंना निवेदन केली. तेव्हां त्यांनी पैशांची व्यवस्था कुणाकडून होईल ते सांगितले व त्या गृहस्थांनी स्वाहाकाराचा सर्व खर्च करण्याची तयारीही दाखविली. एवढ्यांत सावंतवाडीत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. पुन्हां नारोपंतांना स्वप्न झाले की 'प्लेग थांबेल, तुम्ही स्वाहाकाराची तयारी करा.' नारोपंतानी ही स्वप्नांत झालेली आज्ञा त्यावेळी पवनीस चातुर्मासानिमित्त असलेल्या श्रीस्वामीमहाराजांना कळविली. त्यावेळचे श्रीस्वामिमहाराजांचे पत्र असे आहे.(अ.श्रावण शु।।७, शके १८३१).

'रा.रा.नारायण उकिडवे सावंतवाडी यांस नारायण. हल्ली विजयवाड्यातून आपले पूर्वी पाठविलेले पत्र पोचले. जे स्वप्न झाले ते सद्गुरूंनी दाखविले. मंत्रशास्त्रांत मनुष्यांनी केले अनार्ष ग्रंथ यांचे अनुष्ठान करूं नये असे आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्याचा कोणी सांगावा व हा ग्रंथ मी केला असाही अभिमान. श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो, पण स्वाहाकार करा असे अनुमोदन द्यावे अशी प्रवृत्ती होत नाही. गुरुचरित्र स्वाहाकाराविषयी स्वतः निराधार. कांहीच सांगतां येत नाही. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कांही अप्रामाणिक बोलतां येत नाही. कळावे. नारायण.'

ह्या पत्राचा विचार करतां कांही गोष्टी स्पष्ट होतात. मुख्य म्हणजे नारोपंतांना झालेला दृष्टांत दत्तप्रभूंनीच दिलेला आहे ह्याला श्रीस्वामीमहाराजांनी दुजोरा दिला आहे. मानवनिर्मित अनार्ष ग्रंथांचा स्वाहाकार करण्याबद्दल साशंकता प्रकट केली आहे. तसेच गुरुचरित्राचा स्वाहाकार नव्यानेच करण्याचा प्रस्ताव असल्याने त्याला आधीचे कांही प्रमाण वा आधार नाहीत. त्यामुळे ह्याविषयी कांही सांगण्यास आपण असमर्थ आहो असा अभिप्राय दिसतो. हा ग्रंथ आपणच केला असल्याने अभिमानाची भीतीही श्रीस्वामीमहाराजांना वाटली आहे. इतके असूनही ह्या पत्रांत हे हवन करूं नका असे निक्षून न म्हणता 'श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो.' असे म्हटले आहे. ह्या हवनाला संमति देण्याची मात्र श्रीमहाराजांच्या मनाची तयारी नव्हती. श्रीगुरुचरित्राच्या हवनाचा आत्यंतिक निषेध ह्या पत्रांत आढळत

नाही. अनार्ष ग्रंथाच्या अनुष्ठानाच्या निषेधाबद्दलही त्यांनी मंत्रशास्त्राचा हवाला दिला आहे. इथे हे विचारणीय आहे की श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वीपासूनच दुर्गासप्तशती, भागवतपुराण इत्यादी ग्रंथांचे हवन प्रचलित होते. त्याचा श्रीस्वामीमहाराजांनी निषेध केल्याचे ऐकीवांत नाही.

विशेष गोष्ट अशी आहे की आपल्या सद्गुरूंचे हे पत्र आल्यावर नारोपंतांनी हवनाचा विचार सोडून दिला. तरीही भगवान दत्तात्रेयांनी त्यांना पुन्हां स्वप्नद्वारा आज्ञा केली कीं, 'ज्योतीपंतांनी भागवताचा स्वाहाकार केला तसा तू संस्कृत गुरुचरित्राचा कर.' ह्या दृष्टांतांत खरे तर श्रीस्वामीमहाराजांच्या आक्षेपाचे स्पष्ट उत्तर होते. तसेच देवता, निर्वाप, हवनप्रकार यांचीही सूचना होती. नारोपंतांच्या अनन्य गुरुभक्तीचे खरेच कौतुक करायला हवे की वारंवार दत्ताज्ञा होऊनही त्यांनी पुन्हां श्रीस्वामीमहाराजांना पत्रद्वारे विचारणा केली. अपेक्षेप्रमाणे पुन्हा सद्गुरूंचे नकारात्मक पत्र आले. त्यांत 'तुम्हांला कांही कर्तव्य असल्यास १० पारायणे करून ब्राह्मणभोजन घाला.' अशी आज्ञा झाली. कांही अनुष्ठानच न करण्याच्या पूर्वीच्या भूमिकेत पडलेला हा फरक लक्षणीय आहे.

गेल्या ३०-४० वर्षांत द्विसाहस्रीसह श्रीस्वामीमहाराजांच्या अनेक ग्रंथांची हवने त्यांच्या संप्रदायांतील भक्तांनी आयोजित केली आहेत. ह्यापैकी नारेश्वरवासी संत पू. श्रीरंग अवधूत महाराजांच्या शिष्यांचा विशेष पुढाकार दिसतो. तेथील प्रमुख विश्वस्त व श्री. प.प. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. हरिप्रसाद (धीरुभाई) जोशी यांच्या पत्रानुसार द्विसाहस्री गुरुचरित्राचा पहिला स्वाहाकार भरूच येथे त्यांचे पिताश्री व श्रीरंगअवधूतांचे अंतरंग शिष्य पू. श्री शिवप्रसाद जोशी यांच्या पुढाकाराने झाला. हा स्वाहाकार करावा किंवा नाही असा प्रश्न श्रीस्वामीमहाराजांना विचारून प्रार्थनापूर्वक चिठ्ठ्या टाकण्यांत आल्या. त्यांचा होकारार्थी कौल मिळाल्याने स्वाहाकार करण्यांत आला. पू. शिवप्रसाद हे प्रसिद्ध कर्मकांडी असल्याने त्यांनी केलेल्या विधानानुसार हा स्वाहाकार झाला. श्रीदत्तप्रभूंच्या अवतारांची संख्या लक्षांत घेऊन सोळा ऋत्विज हवनाला बसतात. 'द्रां दत्तात्रेयाय नमः' हा पल्लव

लावण्यात येतो. हविर्द्रव्य म्हणून त्रिमधुप्लुत पायसाचा प्रयोग केला जातो. यानंतर अनेक ठिकाणी या संहितेची हवने झाली आहेत. त्यांपैकीं कांहीत लेखकालाही सहभागी होण्याचे भाग्य लाभले आहे.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट आहे की हा ग्रंथ - नव्हे ही संहिता, श्रीदत्तप्रभूंच्या संकल्पानेच सिद्ध झालेली आहे. प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात त्याप्रमाणे हा श्रीदत्तराजांचा ग्रंथावतारच आहे आणि त्याचे 'श्रवण, मनन, निदिध्यासनरूपाने नित्य सेवन करणे' हे सर्व आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू साधकांच्या परमकल्याणाला कारणीभूत ठरणारे आहे. या ग्रंथाच्या मूळ संहितेची मराठी व हिंदी भाषांतरे उपलब्ध आहेत. पण टीकेचे भाषांतर उपलब्ध नव्हते. (अगदी अलीकडेच टीकेचेही एक मराठी भाषांतर पहाण्यांत आले आहे.) त्यासाठी या ग्रंथाचा तसेच टीकेचाही भावार्थ समजून घेण्याचा ह्या ग्रंथांत प्रयत्न केला आहे. प्रस्तुत लेखकाला त्याच्या सीमित क्षमतांची तीव्र जाणीव आहे. ह्या ग्रंथाचा यथार्थ बोध होण्यासाठी आवश्यक असलेली योग्यता लेखकांत अंशतःसुद्धां नाही. पण आपल्या शक्त्यनुसार जे व जेवढे समजेल ते सुबोध प्रकारे सांगण्याचा हा प्रयत्न आहे. निरूपण हा अध्ययनाचाच एक प्रकार आहे. ही त्या ग्रंथात्म्याची सेवाच आहे. सिद्ध ग्रंथांचे वाचन चित्तशुद्धिकारक असल्याने ते अनधिकार व्यक्तीचेही कल्याणच करते ह्या श्रद्धेने केलेले हे लेखन आहे. या प्रयत्नांतून आपल्या अंतःकरणांत त्यांतील आशय अंशतः उतरला तरी हा उद्यम सफल होईल अशी काकुळती आहे. प्रथम मूळ संहितेचे श्लोक देऊन त्यांचा अन्वय खाली दिला आहे. त्यानंतर श्लोक व श्रीस्वामिमहाराजांची टीका यांचा मराठी अनुवाद दिला आहे. कांही ठिकाणी श्रीमहाराजांनी केवळ संकेताने दर्शविलेले संदर्भ मोजक्या शब्दांत स्पष्ट करण्याचाही प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांच्या आशयाला धरूनच हा प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांनी दिलेले व्याकरणाचे संदर्भ मात्र वगळले आहेत. त्यामुळे भावार्थाच्या आकलनात काहीं त्रुटी जाणवणार नाही अशी आशा आहे. विद्वज्जनांना बऱ्याच ठिकाणी प्रस्तुत अनवादकाच्या ज्ञानाच्या मर्यादा दिसून येतील. त्यांनी उदार मनाने त्यांची उपेक्षा करून नीरक्षीरन्यायाने श्रीस्वामिमहाराजांचे प्रमेयरूपी सार ग्रहण

करावे अशी प्रार्थना आहे. वाक्सेवेद्वारे लेखक आणि वाचक उभयतांचेही कल्याण व्हावे हीच श्रीगुरुचरणीं प्रार्थना!

'द्विसाहस्री गुरुचरितम्' हा ग्रंथ प.पू. योगतपस्वी श्रीनारायणकाका ढेकणे महाराज यांच्या प्रेरणेने कार्यरत असलेल्या 'श्रीवासुदेवनिवास स्वाध्याय मंडळांत वाचला आणि चर्चिला गेला आहे. लेखकाला त्याचा बोध होण्यांत मंडळाच्या सदस्यांच्या योगदानाचे ऋण इथे नमूद करणे आवश्यक वाटते. ह्या स्वाध्याय मंडळाच्या माध्यमांतून हे निरूपण आपल्या गुरुपरंपरेला सादर केल्याचे समाधान आम्हांला लाभले आहे. २०१४ इ.स. च्या आषाढ शुक्ल प्रतिपदेला प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज यांची शंभरावी पुण्यतिथि येत आहे. सर्व भारतांत पुढील वर्ष 'समाधीशताब्दि' महोत्सव वर्ष म्हणून साजरे होत आहे. ह्या पर्वणीत हा ग्रंथ प्रकाशित होत आहे हा समष्टीचा एक शुभ संकेतच आहे. त्यांचे हे कार्य त्यांनीच सिद्धीला न्यावे अशी प्रार्थना करूं या.

या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना ते लिखाण श्रीनरसोबावाडीचे वे.मू.डॉ.बाळकृष्ण महादेव जमदग्नि यांच्या निदर्शनास आले. डॉ. जमदग्नि हे प.पू. वक्रतुंडबुवा यांनी सुरूं केलेल्या परंपरेनुसार वाडी येथे श्रीस्वारी(उत्सवमूर्ति)पुढे पुराणसेवा करीत असतात. हे लिखाण त्यांना आवडून त्यांनी ते श्रींच्यापुढे पुराणरूपाने वाचून दाखविले. हा मी भक्तवत्सल भक्ताभिमानी श्रीदत्तप्रभूंचा या लेखनसेवेला लाभलेला आशीर्वादच मानतो. डॉ.जमदग्नि यांनी, तसेच वल्लभविद्यानगर (आणंद) येथील प. पू. श्रीरंग अवधूत महाराजांचे शिष्य विद्वान, व्यासंगी व गुरुभक्त शास्त्री डॉ.जयेंद्रभाई दवे यांनीही ह्या लिखाणाचे परिशीलन करून, महत्त्वपूर्ण सूचना केल्या आहेत व माझा उत्साह आपल्या आत्मीयतेने वाढविला आहे. डॉ.जमदग्नि यांनी परिश्रमपूर्वक मुद्रितांच्या शोधनाचेही कार्य केले आहे. हे दोन्ही विद्वान् दत्तभक्त द्विसाहस्री संहितेचे 'उपजीवी' आहेत. त्यांच्या योगदानाने ह्या ग्रंथाचे मोल वाढले आहे.

ह्या ग्रंथाचे प्रकाशन प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा, श्री अवधूत निवास

ट्रस्ट, नारेश्वर,  आणि श्रीवासुदेवनिवास, पुणे या संस्थांच्या आर्थिक साह्यानेच शक्य झाले आहे. श्रीवासुदेवनिवासाचे प्रमुख विश्वस्त प.पू. पं. शरदभाऊ जोशी यांनी वेळोवेळी दिलेल्या उत्तेजनाचा आणि प्रकाशनासाठी घेतलेल्या पुढाकाराचा इथे विशेष उल्लेख केला पाहिजे. श्रीवासुदेवनिवासच्या विश्वस्तमंडळानेही ह्या कार्याला उत्तम प्रतिसाद दिला आहे. नारेश्वरच्या अवधूतनिवास ट्रस्टचे व प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. डॉ.हरिप्रसाद (धीरूभाई) शिवप्रसाद जोशी यांनी आत्मीयतेने केलेल्या मार्गदर्शनाचा आणि भरघोस साह्याचा प्रस्तुत लेखक सदैव ऋणी राहील. श्रीवासुदेव प्रबोधिनीचे सभासद आणि पदाधिकारी यांनी दहा वर्षे लेखकावर जो लोभ केला आहे त्याचाच हा ग्रंथ एक आविष्कार आहे. या सर्वांचा मी सदैव ऋणी राहीन. या संस्थांच्या आर्थिक सहकारानेच प.पू. योगिराज श्रीगुरुमहाराज यांनी घालून दिलेल्या पायंड्याप्रमाणे, जवळपास ७०० पृष्ठांच्या ह्या ग्रंथाचे मूल्य केवळ २००रु. ठेवणे शक्य झाले आहे.

मे.के.जोशी आणि कंपनी, पुणे हे श्रीवासुदेवनिवास, पुणे यांच्यशी दीर्घकाल संबंधित आहेत आणि भक्तपरिवारांपैकीं आहेत. त्यांनी नेहमीच्या आपुलकीने, तत्परतेने आणि कुशलतेने ह्या ग्रंथाचे उत्तम मुद्रण केल्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

यांत लेखक व वाचक या दोघांचाही लाभ होईल अशी अपेक्षा आहे. द्विसाहस्रीरूप ग्रंथात्म्याची ही सेवाच आहे. प.पू.सद्गुरु योगिराज श्रीगुळवणीमहाराजांनी ती मान्य करावी आणि आपल्या कृपेची साउली निरंतर आमच्यावर धरावी हीच प्रार्थना!

**वासुदेव व्यंकटेश देशमुख.**
एर१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ,
औंध, पुणे ४११००७. भाद्रपद शुक्ल ९, शके १९३५.

## प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी.

'नयन चेंबर्स', २रा मजला, पारकर वाडा, दांडिया बाजार, वडोदरा. दूरध्वनि- ०२६५-२४३१५६९
श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, एरंडवणे, कर्वे पथ, पुणे ४११००७. दूरध्वनि ०२०-२५४५५५८४

महान् दत्तावतारी संत प.प.श्री. वासुदेवानंदसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराज यांचे जीवन, कार्य आणि वाङ्मय यांचा प्रचार तसेच प्रसार करण्याच्या हेतूने, १९ ऑक्टोबर, २००२ कोजागिरी पौर्णिमेच्या के शुभ दिनी, श्रीमहाराजांचे पावन समाधिस्थान श्रीगरुडेश्वर येथे, भारतांतील प्रमुख श्रीदत्तसंस्थांच्या प्रतिनिधिनींनी प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनीची स्थापना केली. साठ वर्षांपूर्वी हैद्राबाद (आं.प्र) येथे श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दीच्या उत्सवांत त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचे प्रकाशन करीत असतां प.पू. योगिराज श्री. वामनरावजी गुळवणी महाराज यांनी अशा प्रकारची एक अखिल भारतीय संस्था असावी असा विचार व्यक्त केला होता. त्याच्या आधारेच या प्रबोधिनीची प्रमुख उद्दिष्टे निश्चित करण्यात आली. (१) प.प. थोरल्या महाराजांच्या समग्र ग्रंथांचे प्रकाशन. (२) ह्या ग्रंथांचे विविध भाषांत अनुवाद. (३) संगणक, इंटरनेट इत्यादि आधुनिक माध्यमांतून श्रीस्वामीमहाराजांच्या जीवन, कार्य आणि साहित्य यांचा प्रसार. (४) श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचे अध्ययन आणि संशोधन यांचा विद्यापीठे आणि महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत व्हावा असा प्रयत्न करून, त्या त्या संस्थांना आवश्यक सहकार्य देणे. (५) ह्या प्रबोधिनीत अधिकाधिक श्रीदत्त संस्थानांना समाविष्ट करून श्रीस्वामीमहाराजांच्या साहित्याचे प्रकाशन, प्रचार व वितरण यांकरिता त्यांचे साह्य मिळविणे. ह्या सर्व संस्थांना एका सौहार्दपूर्ण सूत्रांत गठित करून श्रीदत्तसंप्रदायाच्या विकासासाठी कार्यान्वित करणे. (६) श्रीस्वामीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल झाला आहे. ज्या स्थानांत महाराजश्रींचा निवास झाला - विशेषतः त्यांचे चातुर्मास जिथे जिथे संपन्न झाले, त्या स्थानांत त्यांचे स्मारक निर्माण

करून  नित्य पूजा तसेच महाराजांच्या वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रचाराची सोय करणे.

आज अकरा वर्षानंतर या प्रबोधिनीच्या कार्याची फळे दृग्गोचर होत आहेत. प.प.श्रीटेंबे स्वामी महाराजांचे उपलब्ध सर्व मराठी व संस्कृत ग्रंथ आतां प्रबोधिनीच्या संलग्न संस्थांतून उपलब्ध आहेत. तसेच ते www.shrivasudevanandsaraswati.org या इंटरनेट स्थळावरही उपलब्ध आहेत. श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे मराठी व गुजराती अनुवाद पूर्वीपासूनच उपलब्ध आहेत. आतां द्विसाहस्री, दत्तमाहात्म्य व पंचपाक्षिक या ग्रंथांचे हिन्दी अनुवाद प्रकाशित झाले आहेत. श्रीस्वामिमहाराजांच्या प्रमुख संस्कृत ग्रंथांची तेलुगु आणि कानडी लिपीतील संस्करणे निघाली आहेत. अधिकाधिक भाषांतून श्रीमहाराजांच्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठी प्रबोधिनी प्रयत्नशील आहे. सांप्रतच्या श्रीस्वामींच्या समाधिशताब्दि वर्षात भारतभर विशेष कार्यक्रमांचे आयोजन होत आहे.

प्रबोधिनीच्या ह्या पुण्यकार्यांत सर्व स्वामिभक्तांनी आणि दत्तभक्तांनी सहभागी व्हावे अशी विनंति या निवेदनाद्वारे आम्ही करीत आहो. यथाशक्ति द्रव्यसेवा, वाङ्मयीन सेवा, सामूहिक तसेच वैयक्तिक उपासना इत्यादि प्रकारे या देवकार्यांत योगदान करावे. अकरा हजार किंवा अधिक रकमेचे दान देणाऱ्यांना प्रबोधिनीचे आश्रयदाता होतां येते. तसेच पांचशे रुपये देणाऱ्यांना आजीव सदस्यत्व मिळते. उदार आणि सत्प्रवृत्त दत्तभक्तांना आवाहन आहे की प.प.श्रीस्वामीमहाराजांच्या दत्तसमर्पित जीवनांतून प्रवाहित झालेल्या ह्या दत्तभक्तीच्या पावन गंगेत अधिकतम योगदान करून परमश्रेय साधून घ्यावे.

## प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीविरचितं

## श्रीगुरुचरितम्। सटीक मराठी भाषांतर.

# अनुक्रमणिका.

(विषयांपुढील कंसांतील आंकडे श्लोकांचे आहेत)

### श्रीगुरुस्तुतिः। : १-३३ :



### ज्ञानयोगः।

### प्रथमोऽध्यायः। चरितानुसंधानम्। : ३४-६२ :

## द्वितीयोऽध्यायः। गुरुशिष्यचरितानुकथनम्। : ६३-८० :

नामधारकाची सिद्धमुनीशी भेट व संवाद (१-६) : सद्गुरूंचे माहात्म्य व संशयाचा भक्तीला अडसर (७-१०) : युगनिरूपण आणि कलीला ब्रह्मदेवाचा उपदेश (११-२१) : दीपकाची गुरुसेवा (२२-४७) : दीपकाला विष्णूंचे वरदान आणि त्याच्यावर गुरूंची कृपा (४८-५७) : दीपकाख्यानाचा समारोप (५८-६३).

## तृतीयोऽध्यायः। दत्तावतारकथनम्। : ८१-१०१ :

गुरुकथा भवसागरांतील नौका (१-७): अत्रि आणि अनसूया (८-१३) : नारदकृत अनसूयास्तवनाने रुष्ट देवींच्या शांतवनासाठी ब्रह्मा, विष्णु आणि महेश अत्रिऋषींच्या आश्रमांत (१४-१६) : अनसूयेच्या पातिव्रत्यप्रभावाने तिन्ही देवांना बालकत्व.(१७-२४) : अनसूयेच्या दुधाने तीनही देवांची तृप्ती.(२५- ३०) : अत्रिऋषीकृत स्तुति.(३१-३४) : तिघांचे अत्रि आणि अनसूया यांना वरदान आणि तिघांचे नामकरण. (३५-४१) : अंबरीषाची कथा. (४२-५७).

## चतुर्थोऽध्यायः। दत्तलीलाकथनम्। : १०२-१४३ :

श्रीदत्त-यदुसंवाद 'अवधूतगीता'. (१-४०) : प्रह्लादावर अनुग्रह. (४१-४४) : कार्तवीर्याला अष्टांगयोग आणि आत्मज्ञान यांचा उपदेश. (४५-५७).

## पञ्चमोऽध्यायः। श्रीपादावतारः। : १४४-१५९

उपोद्घात (१-२) : परमेश्वर पक्षपाती आहे कां?(२-४) : सुमतिब्राह्मणीला पुत्रप्राप्तीचे वरदान (५-१४) : श्रीपादांचा जन्म (१५-२१) : श्रीपादश्रीवल्लभांचा मातेला उपदेश आणि गृहत्याग (२२-२५) : दोन्ही भावांच्या व्यंगांचा परिहार.(२६-२७) : मातेला स्वरूपदर्शन, (२७-३२) बंधूना उपदेश, काशीला प्रयाण. (३३-३६).

## षष्ठोऽध्यायः। गोकर्णवर्णनम्। : १६०-१७४

मातेसाठी रावणाचा कैलास आणण्याचा उद्यम.(१-५) : रावणाच्या संगीतसेवेने शंकराकडून प्राणलिंगाचे दान.(६-१२) : रावणाला फसवून गोकर्णांत लिंगाची स्थापना.(१३-३१) : मित्रसह राजाची कथा.(३२-३७) : चंडालीचे आख्यान.(३८-५१) : गोकर्णमाहात्म्य.(५२-५४).

## सप्तमोऽध्यायः। श्रीपादमहिमावर्णनम्। : १७५-१८७

विद्वान् ब्राह्मणाच्या मंदमति मुलाची कथा (१-११) : शनिप्रदोषाचे आख्यान (१२-२७) : अंबिकेच्या पुत्राला वरदानाने सुविद्य केले.(२८-३०): अंबिकेच्या प्रदोषव्रताचे फल देण्यासाठी पुनरावतार (३१-३६): ब्राह्मण व्यापारी भक्ताचे चोरांपासून रक्षण (३७-४७): कुरुगड्डीचे आणि श्रीपादश्रीवल्लभांच्या भक्तीचे माहात्म्य (४८-५०).

## अष्टमोऽध्यायः। श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनम्। : १८८-२१५

अंबिकेचा पुनर्जन्म आणि माधवब्राह्मणाशी विवाह.(१-६) : धर्माला अनुकूल कामाचे अनिंद्यत्व (७) : नृसिंहसरस्वतींचा अवतार, जन्मतः ॐकाराचा उच्चार (८-१५): बाल्यावस्थेतील चमत्कार आणि लीलेने मूक राहणे.(१६-२१): लोहाचे सोने करून मुंज लावण्याचा मातापित्यांना संकेत.(२१-२४) : उपनयनानंतर लगेच वेदपठण (२५-२६) : संन्यासाठी आईवडिलांच्या अनुज्ञेची मागणी (२७-२९) : दुःखी मातेला उपदेश.(३०-४१) : मातेला आपल्या स्वरूपाचे दर्शन, पुत्रप्राप्तीचे वरदान; मातेने केलेली स्तुति.(४२-४५) : मातेच्या इच्छेनुसार एक वर्ष घरी राहून शिष्यांना अध्यापन.(४६-४७) : आईला जुळे झाल्यावर काशीला प्रयाण (४८-५२) : काशीतील तपाचरण आणि तेथील संन्याशांची प्रार्थना (५३-५७) : कृष्णसरस्वतींकडून संन्यास घेऊन संन्यासमार्गाचा प्रसार.(५८-६०) : महावाक्यांसहित संन्यासधर्माचा आणि योगाचाउपदेश (६१-६७) :  गुरुपरंपरा (६८-७७).

## नवमोऽध्यायः। तीर्थयात्रोद्देशः। : २१६-२४३ :



## दशमोऽध्यायः। गुरुभक्त्यनुशासनम्। : २४४-२५५ :



## एकादशोऽध्यायः। कृष्णापञ्चगङ्गासङ्गमोत्कर्षकथनम्। : २५६-२७२ :

## द्वादशोऽध्यायः। प्रेतसंजीवनम्। : २७३-२९४ :

श्रीगुरूंचे स्वरूप (१-४) : अपत्यनाशाची कारणे. (५-१३) : ब्राह्मणीची भूतबाधा दूर करून तिला पुत्रलाभ. (१४-३२) : ब्राह्मणीच्या ज्येष्ठ पुत्राचा मृत्यू आणि तिचा शोक.(३३-३९) : ग्रामवासीयांचे न ऐकतां तिचे पुत्राला कवटाळून राहणे.(४०-४५) : तापसाचा उपदेश.(४६-५४): ब्राह्मणीला स्वप्नांत दर्शन व प्राणाचे निरूपण.(५५-६०) : पुत्राचे संजीवन.(६१-६६)

## त्रयोदशोऽध्यायः। भीमामरजासङ्गमनिवासः। : २९५-३०८ :

वांझ म्हैस दुभती केली. (१-१०) : राजाच्या प्रार्थनेला मान देऊन गाणगापुरांत आगमन.(११-१८) : गांवाच्या वेशीजवळ ब्रह्मराक्षसाचा उद्धार.(१९-२२). राजाने अर्पण केलेल्या मठांत निवास.(२३-२५). : त्रिविक्रम भारतीला विश्वरूपदर्शन (२६-४९).

## कर्मयोगः। चतुर्दशोऽध्यायः। वेदोपदेशः। : ३०९-३२९ :

कर्म हे ज्ञानाचे साधन कसे आहे. (१-२) : संस्कारांचे महत्त्व आणि विविदिषा. (३-५) : विद्येचा गर्व झालेल्या ब्राह्मणांचे त्रिविक्रम भारतीला आह्वान.(६-२०) : त्रिविक्रमकृत श्रीगुरुस्तुति. (२१-२३). श्रीगुरूंचा गर्विष्ठ ब्राह्मणांना उपदेश आणि वेदनिरूपण.(२४-४५) : चंडालाद्वारें विद्वानांचे गर्वहरण.(४६-५६) : विद्वानांचा पश्चात्ताप व त्यांना उःशाप. (५७-६२).

## पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाकः। : ३३०-३५१ :

चंडालयोनी कुणाला प्राप्त होते? (१-११) : मृत्यूनंतर जीवाची गति. (११-१५) : कोणत्या पापाने कोणत्या योनी प्राप्त होतात. (१६-१९) : पापांपासून रोगांचा उद्भव.(२०-२१) : चोरीची फळे.(२१-२३) : व्यभिचाराची फळे.(२३-२५) : प्रायश्चित्त प्रकरण. (२६-४१) : पतिताचे ज्ञानहरण. (४२-५१) : भस्ममाहात्म्य. (५२-८१).

## षोडशोऽध्यायः। मृतसंजीवनम्। : ३५२-३८३ :

श्रेयस् आणि प्रेयस् मार्ग.(उपोदघात) : सद्गुरूंच्या अगम्य लीला.(१-३) : गोपीनाथाचा पुत्र दत्त याची कथा.(४-१८) : गाणगापुरांत प्रवेश करतांना त्याचा मृत्यू आणि सावित्रीचा शोक.(१९-३०) : साधूच्या रूपांतील श्रीगुरूंचा सावित्रीला उपदेश.(३१-३९) : स्त्रियांचे धर्म. (४०-५७) : विधवाधर्मनिरूपण. (५८-६५) : सहगमनाचे माहात्म्य. (६६-७०) : सावित्रीचा सहगमनाचा निर्धार. (७१-८१) : सहगमनापूर्वी श्रीगुरूंच्या दर्शनाला गेलेल्या साध्वीने केलेली स्तुति. (८२-८४): सावित्रीच्या पतीचे संजीवन. (८५-९९).

## सप्तदशोऽध्यायः। दम्पतीगुरुसंवादः। : ३८४-४०९ :

रुद्राक्षधारणाचा महिमा.(१-७) : वेश्यासतीचे उपाख्यान. (८-२२) : रुद्राध्यायाचे माहात्म्य. (२३-४१) : स्त्रियांना मंत्राचा उपदेश करूं नये याविषयी कचाख्यानाचे निरूपण.(४२-६७) : सोमवारव्रत आणि सीमंतिनीचे उपाख्यान.(६८-१०६).

## अष्टादशोऽध्यायः। कर्मकाण्डकथनम्। : ४१०-४६२ :

परान्नत्यागी ब्राह्मणाच्या कर्कशा पत्नीचा स्वभावपालट.(१-१०) : परान्नाविषयी ग्राह्याग्राह्य विचार. (११-२०) : पराशरप्रणीत कर्ममार्गनिरूपण. (२१-२५) : आचारधर्माची परिभाषा. (२६-५०) : शौच आणि स्नान. (५१-६७) : भस्म, मृत्तिका, चंदन, मुद्रिका यांचे धारण (६८-७२) : आचमन.(७३-८१) : संध्यावंदन. (८२-१०२) : गायत्रीमंत्राचा जप. (१०३-१०८) : गुरूंचे अभिवादन. (१०९-११२) : अग्नीची उपासना. (११३-११८) : गृहशुद्धि. (११८-१२१) : देवपूजा. (१२२-१४५) : ब्रह्मयज्ञ. (१४६-१४८) : तर्पण. (१४९-१५१) : वैश्वदेव आणि बली. (१५२-१५५) : भोजनविधि. (१५६-१७४) : निद्रा.(१७५-१७९) : संभोग. (१८०-१८५) : विचाराचार. (१८६-१८८).

## भक्तियोगः। एकोनविंशोऽध्यायः। भक्तिमहिमावर्णनम्। : ४६३-५०१ :

सर्वसाधनसाधक भक्ति. (१-६) : भास्करब्राह्मणाची कथा.(७-३०) : अश्वत्थमहिमा. (३१-४८) : साठ वर्षांच्या वंध्येला पुत्रप्राप्ती. (४९-७३) : कुष्ठी नरहरी ब्राह्मणाची कथा.(७४-८४) : शबराची शिवभक्ति.(८५-९८) : शुष्क काष्ठाला पालवी आणि नरहरीचा कुष्ठपरिहार. (९९-१०१) : नरहरीकृत श्रीगुरुस्तोत्र. (१०२-११०) : समारोप.(१११-११६).

## विंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५०२-५३० :

सायंदेवाची परीक्षा.(१-२३) : गुरुसेवेची दुष्करता.(२४-२८) : त्वष्टापुत्राची कथा आणि काशीयात्रानिरूपण. (२९-५६) : सायंदेवकृत नृसिंहसरस्वतीस्तोत्र.(५७-६६) : अनंतव्रताचे निरूपण.(६७-१११).

## एकविंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५३१-५५५ :

तंतुकभक्ताला श्रीशैल्यदर्शन आणि श्रीशैल्यमाहात्म्य.(१-३६) : देवीच्या निरोपाने आलेल्या नन्दी ब्राह्मणाचा कुष्ठपरिहार.(३७-५६) : अवशिष्ट कुष्ठ जाण्यासाठी श्रीगुरूंच्या आज्ञेने त्याने केलेली स्तुति. (५७-९१) : नरहरी कवीला कल्लेश्वराठायीं दर्शन आणि अनुग्रह.(९२-१०३).

## द्वाविंशोऽध्यायः। क्षेत्रमाहात्म्यवर्णनम्। : ५५६-५८४ :

भगवंताचे भक्तवात्सल्य आणि भक्तपराधीनता.(१-१२) : आठ रूपांनी आठ भक्तांच्या गांवी दिवाळी साजरी.(१३-३३) : शेतकरी भक्ताचे शेत अमाप पिकविले.(३४-७२) : गाणगापूरच्या अष्टतीर्थांचे निरूपण. (७३-१०२).

**त्रयोविंशोऽध्यायः। : ५८५-६१९ :**

पाप-तापहारी श्रीगुरुचरित्र मोक्षाहूनही ग्राह्य.(१-९) : कुरुगड्डीच्या परीटाला राज्याचे वरदान.(१०-१८) : त्याचा बिदरचा राजा म्हणून पुनर्जन्म.(१९-२६) : स्फोटकग्रस्त राजाला ब्राह्मणाचा उपदेश व ऋषभमुनींची कथा.(२७-६५) : म्लेच्छ राजाच्या स्फोटकाचे शमन.(६६-७७) : म्लेच्छ राजाच्या गांवी गमन व त्याचा उद्धार.(७८-१०५) : श्रीशैलयात्रा व गाणगापुरच्या मठांत शाश्वत वास.(१०६-११२) : ग्रंथाचा उपसंहार आणि मंगलाचरण.(११२-११८).

**योगरहस्यम्। : ६२०-६४० :**

**बोधरहस्यम्। : ६४१-६६३ :**

## सप्ताहपाठपद्धति -

प्रथमेऽह्नि, चतुर्थाध्यायांत, द्वितीये नवमाध्यायांत, तृतीये चतुर्दशाध्यायान्त, पंचमे एकोनविंशाध्यायन्त, षष्ठे एकविंशाध्यान्त, सप्तमे त्रयोविंशाऽध्यायान्त पठित्वा रहस्यद्वयं पठेत्। प्रत्यहमादौ ग्रन्थपूजनोत्तरं श्रीवैष्णवेत्यादिस्तुतयः पठेत्। अन्ते चोत्तरपूजनं कृत्वा 'रसज्ञा वशे'त्यपराधक्षमापनस्तोत्रं पठेत्।

पहिल्या दिवशीं यथाविधि संकल्प करून तसेच ग्रंथपूजन करून वाचनाला आरंभ करावा. प्रतिदिनी आरंभी श्रीगुरुस्तुति वाचावी व मग त्या दिवशींचे अध्याय वाचावेत. **१ल्या दिवशी ४थ्या अध्यायापर्यंत, २न्या दिवशी ९ अध्यायापर्यंत, ३न्या दिवशी १४व्या अध्यायापर्यंत, ४थ्या दिवशी १७ व्या अध्यायापर्यंत, ५ व्या दिवशी १९ व्या अध्यायापर्यंत, ६ व्या दिवशी २१ व्या अध्यायापर्यंत आणि ७ व्या दिवशी २३ व्या अध्यायापर्यंत वाचून योगरहस्य आणि बोधरहस्य वाचून उत्तरपूजा करावी.** वाचनानंतर रोज 'रसज्ञा वशा तारकं स्वादु लभ्यं..' हे क्षमापराधनस्तोत्र वाचावे. पारायणकालांत श्रीगुरुचरित्राच्या पारायणाचे सर्व शुचिता-आहार-विहारादि नियम पाळावेत.

**या ग्रंथाचे मराठी भाषांतर स्त्रियांना वाचण्यास हरकत नाही.**

या ग्रंथाचे एकाह्न पारायणसुद्धां करतां येते. संकल्प व ग्रंथपूजन करून श्रीगुरुस्तुतीपासून आरंभ करून बोधरहस्यापर्यंत वाचन पुरे झाल्यावर रसज्ञा वशा  स्तोत्राचा पाठ करून उत्तरपूजा करावी.

# श्रीगुरुस्तुतिः

मंगलाचरण

**श्रीवैष्णवैशगाणेश-सौर्यशाक्त्यादिरूपधृक् । दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनन्तः सदा मे हृदि सद्गुरुः ॥१॥**
**योऽजोऽनन्तोऽगुणोऽरूपो निस्तृडेकोऽक्रियोऽसृजत् । विश्वं धृत्वा षोडशांशं पुंरूपं योगमायया ॥२॥**
**दृश्यते ज्ञानदृष्ट्या यत्सहस्राक्षिशिरोऽङ्घ्रि सत् । रूपं यदङ्गसंस्थानैर्लोकव्यासः प्रकल्प्यते ॥३॥**

श्री+वैष्णव+ऐश+गाणेश+सौर्य+शाक्त्य+आदि+रूप+धृक् अजः अनन्तः दत्तात्रेयः सदा मे हृदि अस्तु।१। यः अजः अनन्तः अगुणः, अरूपः, निस्तृट्, एकः अक्रियः योग+मायया षोडश+अंशं पुं+रूपं धृत्वा विश्वं असृजत्।२। यत् (पुंरूपं) सहस्र+अङ्घ्रि+शिरः सत् रूपं ज्ञानदृष्ट्या दृश्यते। यत्+अङ्ग+संस्थानैः लोक+व्यासः प्रकल्प्यते।३।

पहिला श्लोक हे देवतावाचक मंगल आहे. *देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः। सर्वे ते नैव निंद्याः स्युर्लिपितो गणितोपि वा। मंगलाचरणं शिष्टाचारात्फलदर्शनाच्छ्रुतितश्च।* (सांख्यदर्शन ५।१). ज्ञान, ऐश्वर्य आदि वैभवाने युक्त अशा विष्णु, शिव, गणेश, सूर्य, देवी (शक्ति) तसेच इंद्र, अग्नि (आदि) मूर्ति आपल्या मायेच्या सामर्थ्याने धारण करणारे पण तत्त्वतः अनादि आणि अनंत असणारे सद्गुरू दत्तभगवान् नित्य माझ्या चित्तांत असोत.१.

**दत्तात्रेयांचे स्वरूप.** असा जो जन्मरहित, अनंत, निर्गुण, निरिच्छ, एकमेवाद्वितीय, अक्रिय परमात्मा त्याने आपल्या योगमायेने सोळा अंशांचे (११ इंद्रिये आणि पंचमहाभूते) विराट पुरुषरूप धारण करून विश्व निर्माण केले. अनंत पाय आणि अनंत शिरे असलेले ते स्वरूप (योगीजनांनाच) ज्ञानचक्षूंनी दिसते. या विराट रूपाच्या अवयवांपासूनच पातालादि लोकांचा विस्तार झाला आहे.२-३.

**नानावतारबीजं यदनन्तं यत्कलामुखैः । देवतिर्यङ्मुखं सृष्टमस्वतन्त्रं जगत्पुरु ।।४।।**
**गोभिः स्वार्थादानमीश-सृष्टं नेशात्परं क्वचित् । देहेन्द्रियात्मजीवोत्थौ रागद्वेषावियन्तु भित् ।।५।।**
**भूतेट् सोऽजोऽव्ययात्मापि संभवत्यात्ममायया । श्रेयोऽर्हसाधुगुप्त्यै स्वप्रकृतिस्थो युगे युगे ।।६।।**

यत् अनन्तं नाना+अवतार+बीजम्। यत्+कला+मुखैः देव+तिर्यक्+मुखं अस्वतन्त्रं पुरु जगत् सृष्टम्।४। गोभिः स्व+अर्थ+आदानं ईश+सृष्टम्। ईशात् परं न क्वचित्। देह+इन्द्रिय+आत्म+जीव+उत्थौ राग+द्वेषौ इयं तु भित्।५। सः भूत+ईट् अजः अव्ययः अपि आत्म+मायया स्व+प्रकृति+स्थः श्रेयः+अर्ह+साधु+गुप्त्यै युगे युगे संभवति।६।

ह्याच अनेक अवतारांच्या बीज असलेल्या अनंत स्वरूपाने आपल्या ब्रह्मदेव, मरीचि आदि कलांच्या द्वारा देव-तिर्यगादि योनींनी युक्त अशा अपरिमित अशा जगताची निर्मिति केली.४. (ह्या जगांत) इंद्रियांची आपापले विषय ग्रहण करण्याची क्षमता परमेश्वरानेच निर्मिली आहे. सर्वांचे अधिष्ठान अशा ईश्वराखेरीज (ह्या सृष्टीत) कांहीच नाही. तरी पण देह आणि इंद्रिये यांच्याशी तादात्म्य होऊन त्यांच्या अभिमानाने जीवाला राग (आकर्षण) आणि द्वेष प्राप्त झाले. हेच भेदाचे मूळ होय. म्हणजेच जीवसृष्टी आणि ईश्वरसृष्टी असा भेद भासू लागला. ह्या भेदामुळेच जीव आपल्या सच्चिदानंदैकरस स्वरूपाला विसरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी अशी विपरीत भावना करतो.५. तोच सर्व भूतांचा ईश्वर, अजन्मा आणि अक्षर असूनही, आपल्या आपल्या प्रकृतीचा, म्हणजेच मायेचा आश्रय करून, मोक्षाला योग्य अशा साधूंच्या रक्षणासाठी जन्म घेतो. *(अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया।।.. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।। श्री.भ.गी.४।६, ८.)*६.

**श्रुत्वा तत्कर्म निर्द्वन्द्वो मुच्यते कर्मबन्धनात् । न तथा कर्मसिद्धीप्सुर्द्वन्द्वात्मा भ्रान्तहृन्नरः ।।७।।**
**गुणकर्मभिदा सृष्ट-चातुर्वर्ण्यस्य सोऽव्ययः । कर्ताप्यकर्ता यैर्ज्ञातो बध्यन्ते कर्मभिर्न ये ।।८।।**
**भूभारभूततद्द्वेष्य-घाताय विविधास्तनूः । धृत्वा कण्टकवन्मत्वा कृतकार्यो जहात्यसौ ।।९।।**
**अस्यैवापूर्णकृत्याः स्युस्तन्वस्तासूत्तमोत्तमा । तनुरेकास्ति दत्ताख्या कृपासूः स्मर्तृगामिनी ।।१०।।**

तत्+कर्म श्रुत्वा निर्द्वन्द्वः (यथा) कर्म+बन्धनात् मुच्यते तथा कर्म+सिद्धि+ईप्सुः द्वन्द्व+आत्मा भ्रान्त+हृत् नरः न (मुच्यते)।७। गुण+कर्म+भिदा सृष्ट+चातुर्वर्णस्य सः अव्ययः कर्ता अपि यैः अकर्ता ज्ञाता, ये कर्मभिः न बध्यन्ते, भू+भार+भूत तत्+द्वेष्य+घाताय असौ विविधाः तनूः धृत्वा कृत+कार्यो कण्टकवत् मत्वा जहाति।८-९। अस्य एव अपूर्ण+कृत्याः तन्वः स्युः। तासु एका उत्तम+उत्तमा कृपासूः स्मर्तृ+गामिनी तनुः अस्ति।१०।

त्या (त्या अवतारांच्या साधुरक्षणात्मक) चरित्राचे निष्कामतया श्रवण केल्याने साधु जसा कर्मबंधनांतून सुटतो तसा कर्मफलाची अभिलाषा करणारा भ्रांतचित्त श्रवणपराङ्मुख असाधु मुक्त होत नाही.७. सत्त्व, रज आणि तम हे गुण आणि शमादि कर्म यांच्या भेदानुसार चार वर्णांची निर्मिती करणारा तो परमात्मा असंग आणि उदासीन असल्याने अकर्ताच आहे असे जाणल्याने स्वकर्मांनी जे बांधले जात नाहीत,८. त्या (साधूंचा) द्वेष करणारे, भूमीला भारभूत झालेले जे दुष्ट, त्यांचा विनाशासाठी विविध शरीरे धारण करून हा प्रभू (त्या त्या अवतारांचे) कार्य पूर्ण होतांच त्यांना (कांटा काढण्यासाठी घेतलेल्या) कांट्याप्रमाणे टाकून देतो. त्या त्या देहांचे विसर्जन करतो.९.

**अवताररहस्य.** (असे जर आहे तर नर, नारायण, नारद, सनक इत्यादि कसे चिरंजीव आहेत अशी शंका अपेक्षून महाराज सांगतात) ज्यांचे कार्य अजून अपूर्ण आहे असे ह्या ईश्वराच्या अनेक मूर्ति आहेत. त्यांतीलच एक उत्तमोत्तम श्रीदत्त या नांवाची तनू कृपाळू आणि स्मर्तृगामी अशी आहे.१०.

**मुक्तैर्मुमुक्षिभिश्चान्यैर्ध्येया नान्येदृशी कलौ । कामदा यस्य कस्यापि स्मृतिगामिन्यनुक्षणम् ।।११।।**
**विश्वं ततान योऽव्यक्तस्तद्यत्स्थं यो न तत्स्थितः । तद्यत्स्थं नैश्वराद्योगात्तद्भृत्तत्स्थो न वायुवत् ।।१२।।**
**मावशाद्योऽवशोऽभीक्ष्णं व्यसृजत्तदबंधनः । येनाध्यक्षेण मा सूते जगद्वेदामलं न यम् ।।१३।।**
**नृरूपेणावतीर्णं यत्तत्त्वाज्ञोऽसुरभावगः । न वेत्ति योगगम्यं यं सद्धर्मत्राणकारणम् ।।१४।।**

कलौ मुक्तैः मुमुक्षुभिः च अन्यैः ध्येया ईदृशी कामदा, अनुक्षणं स्मृतिगामिनी अन्या न।११। यः अव्यक्तः विश्वं ततान, तत् यत्स्थं, यः न तत्+स्थितः। तत् न यत्+स्थं ऐश्वरात् योगात् वायुवत् तत्+भृत् न तत्+स्थः।१२। मा+वशात् यः अवशः अभीक्ष्णं तत् अबन्धनः व्यसृजत्। मा येन अध्यक्षेण जगत् सूते यं अमलं न वेद।१३। यत्+तत्त्व+अज्ञः असुर+भाव+गः नृ+रूपेण+अवतीर्णं योगगम्यं सत्+धर्म+त्राण+कारणं न वेत्ति।१४।

मुक्त, मुमुक्षु आणि विषयी यांनी चिंतण्यायोग्य, स्मरणमात्रे संतोष पावून क्षणमात्रांत प्रत्येकाच्या कामना पुरविणारे कलियुगांत दुसरे दैवत नाही.११. विश्वाचा विस्तार करणारा तो ज्ञान, ऐश्वर्य, बल, तेज आणि वीर्यानी युक्त असा अव्यक्त (परोक्ष) पुरुष ज्याच्या ठायीं ते (विश्व) स्थित आहे, त्यांचे पोषण करतो आहे. तरीसुद्धां जो जगाला धारण करणारा ईश्वर वायूप्रमाणे सर्वव्याप्त असूनही त्या विश्वांत स्थिरावत नाही. श्रीमच्छंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे मायेच्या अध्यासाने हे अखिल जगत् मी विस्तारलेले असल्याने ते सर्व जीव माझ्याच आधाराने स्थिर आहेत; पण मी त्यांच्यात नाही. शिंपल्यावर चांदीचा भास होतो. त्या शिंपल्यांतच चांदी आहे; पण चांदीत मात्र शिंपल्याचा अंशही नसतो. म्हणूनच भगवंत म्हणतात हे सर्व जीव माझ्यांत राहतात. हे सर्व इंद्रियगोचर जगत् इंद्रजालाप्रमाणे मिथ्या आहे.१२. मायेच्या योगाने पण मायेला वश न होता तिच्या बंधनाच्या पलीकडे असणारा (परमात्मा) ह्या वैविध्यपूर्ण जगाचे सृजन करतो. ज्याच्या आधिपत्याखाली माया ह्या जगताला जन्म देते; ते जगत् मात्र त्या शुद्ध ईश्वराला जाणत नाही.१३. त्या संत आणि धर्म यांच्या रक्षणासाठी मनुष्यरूपाने अवतरलेल्या योगगम्य भगवंताला, त्याचे तत्त्व न जाणणारे, आसुरी संपत्तीने अभिभूत झालेले (दुष्ट जीव) ओळखत नाहीत.१४.

**सोऽन्वर्थाख्यानसूयात्रिपुत्रो जज्ञेऽज ईश्वरः । अचिन्त्याव्यक्तरूपोऽपि दत्तोऽर्च्यः स्मृतितोषणः ।।१५।।**
**परानन्दमयो विष्णुर्हृत्स्थोऽवेद्योऽप्यतीन्द्रियः । सदा सम्पूज्यते भक्तैर्भगवान् भक्तिभावनः ।।१६।।**
**अचिन्त्यस्य कुतो ध्यानं कूटस्थावाहनं कुतः। क्वासनं विश्वसंस्थस्य पाद्यं पूतात्मनः कुतः ।।१७।।**
**क्वानर्घोरुक्रमस्यार्घ्यं विष्णोराचमनं कुतः। निर्मलस्य कुतः स्नानं क्व निरावरणेऽम्बरम् ।।१८।।**

सः अनु+अर्थ+आख्यः अनसूया+अत्रि+पुत्रः ईश्वरः जज्ञे। अचिन्त्य+अव्यक्त+रूपः अपि स्मृति+तोषणः दत्तः अर्च्यः।१५। पर+आनन्द+मयः विष्णुः हृत्स्थः अवेद्यः अति+इन्द्रियः अपि भक्तिभावनः भगवान् भक्तैः सदा सम्पूज्यते।१६। अचिन्त्यस्य कुतः ध्यानम्? कूटस्थ+आवाहनं कुतः? विश्व+संस्थस्य क्व आसनम्? पूत+आत्मनः पाद्यं कुतः?।१७। अनर्घ+उरु+क्रमस्य अर्घ्यं क्व? विष्णोः आचमनं कुतः? निर्मलस्य कुतः स्नानं? निरावरणे अम्बरं क्व?।१८।

**दत्तात्रेयांच्या सगुण स्वरूपाची पूजनीयता.** स्वतःचेच दान करून आपले दत्त हे नाम सार्थक केलेला अनसूया आणि अत्रीचा पुत्रच ईश्वर आहे असे जाणा. अचिंत्य आणि अव्यक्त (मन आणि इंद्रियांच्या अतीत) रूपाच्या त्या स्मरणानेच संतुष्ट होणाऱ्या दत्ताचे पूजन करावे.१५. परमानंदस्वरूप तो विष्णु हृदयस्थ असूनही अतीन्द्रिय असल्याने जाणीवेच्या पलीकडे आहे. तरीही भक्तीने वश होणाऱ्या त्या भगवंताचे भक्तांनी श्रद्धेने नित्य पूजन केले पाहिजे.१६. **मानसपूजा.** ह्या मानसपूजेचा पूर्वार्ध श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या परापूजा ह्या स्तोत्राशी खूप जुळणारा आहे. अचिंत्याचे ध्यान कसे करतां येईल? अखंडतया एकरूपाने तिन्ही कालांना व्यापणाऱ्याचे आवाहन कसे करतां येईल?१७. ज्याचे पदकमल अनर्घ म्हणजे अमूल्य आहेत त्याला अर्घ्य कशाचे देणार? सर्वव्यापकाला आचमन काय द्यावे? शुद्धस्वरूपाला कुठले स्नान? आवरणातीताला वस्त्र कुठून आणावे?१८.

**स्वसूत्रस्य कुतः सूत्रं निर्मलस्य च लेपनम् । निस्तृषः सुमनोभिः किं किमक्लेद्यस्य धूपतः ।।१९।।**
**स्वप्रकाशस्य दीपैः किं किं भक्ष्याद्यैर्जगद्भृतः । किं देयं परितृप्तस्य विराजः क्व प्रदक्षिणाः ।।२०।।**
**किमनन्तस्य नतिभिः स्तौति को वागगोचरम् । अन्तर्बहिःप्रपूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ।।२१।।**
**सर्वतोऽपीत्यसंभाव्यो भाव्यते भक्तिभावनः । सेव्यसेवकभावेन भक्तैर्लीलानृविग्रहः ।।२२।।**
**तवेशातीन्द्रियस्यापि पारम्पर्याश्रुतां तनुम् । प्रकल्प्याश्मादावर्चन्ति प्रार्चयेऽर्चां मनोमयीम् ।।२३।।**

स्व+सूत्रस्य कुतः सूत्रम्? निर्मलस्य च लेपनम्? निस्तृषः सुमनोभिः किम्? अक्लेद्यस्य धूपतः किम्?।१९। स्व+प्रकाशस्य दीपैः किम्? जगत्+भृतः भक्ष्याद्यैः किम्? परितृप्तस्य किं देयम्? विराजः क्व प्रदक्षिणाः?।२०। अनन्तस्य नतिभिः किम्? वाक्+अगोचरं कः स्तौति? अन्तः+बहिः+परिपूर्णस्य उद्वासनं कथं भवेत्?।२१। इति सर्वतः अपि असंभाव्यः भक्तिभावनः लीला+नृ+विग्रहः भक्तैः सेव्य+सेवक+भावेन भाव्यते।२२। (हे) ईश, तव अति+इन्द्रियस्य अपि पारम्पर्या आश्रुतां तनूं अश्मादौ प्रकल्प्य अर्चन्ति। मनोमयीं अर्चां प्रार्चये।२३।

स्वसूत्राला (सर्वतंत्रस्वतंत्र अशा देवाला) सूत्र (यज्ञोपवीत) कुठले? निर्मलाला गंध लेपन कोणते द्यावे? तृष्णारहित परमात्म्याला फुलाचे काय महत्त्व? अक्लेद्य (पाण्याने न ओलावणाऱ्या) देवाला धूपाचा काय उपयोग? स्वयंप्रकाशाला दिवा कशासाठी दाखववावा? जगाचे पोषण करणाऱ्याला खाद्याची काय आवश्यकता? नित्यतृप्त भगवंताला काय दक्षिणा द्यायची? विराट पुरुषाला प्रदक्षिणा कशी करायची? अनन्ताला नमस्कारांनी काय होणार? आणि वाचेला अगोचर अशा देवाची स्तुति तरी कशी करणार? अंतर्बाह्य परिपूर्ण अशा ईश्वराचे विसर्जन कसे होईल?१९-२१. अशा सर्वतोपरी अकल्पनीय अशा भगवंताने लीलेने धारण केलेल्या नरदेहाची कल्पना करून, त्याला स्वामी मानून सेवकभावाने पुजावे; कारण तो भक्तीला पावतो.२२. (हे भगवंता) तूं अतींद्रिय असलास तरी गुरुपरंपरेने चालत आलेल्या पाषाणादि अष्टविध प्रतिमांनाच तुझे शरीर मानून अल्पबुद्धीचे भक्त पूजन करतात. मी ध्यानयोगासाठी, मनाची लवकर एकाग्रता होण्यासाठी ह्या आठ मूर्तींत उत्तम मानल्या गेलेल्या मानस मूर्तीचे तीव्रतेने पूजन करीत आहे.२३.

**कलसुश्लोकगीतेन भगवन्दत्त जागृहि । भक्तवत्सल सामीप्यं कुरु मे मानसार्चने ।।२४।।**
**श्रीदत्तं खेचरीमुद्रा-मुद्रितं योगिसद्गुरुम् । सिद्धासनस्थं ध्यायेऽभी-वरप्रदकरं हरिम् ।।२५।।**
**दत्तात्रेयाह्वयाम्यत्र परिवारैः सहार्चने । श्रद्धाभक्त्येश्वरागच्छ ध्यातधाम्नाञ्जसा विभो ।।२६।।**
**सौवर्णं रत्नजडितं कल्पितं देवतामयम् । रम्यं सिंहासनं दत्त तत्रोपविश यंत्रिते ।।२७।।**
**पाद्यं चंदनकर्पूर-सुरभि स्वादु वारि ते । गृहाण कल्पितं तेन दत्ताङ्घ्री क्षालयामि ते ।।२८।।**

(हे) भगवन् दत्त! कल+सुश्लोक+गीतेन जागृहि। (हे) भक्तवत्सल, मानस+अर्चने मे सामीप्यं कुरु।२४। सिद्ध+आसनस्थं खेचरी+मुद्रा+मुद्रितं अभी+वर+प्रदं योगि+सद्गुरुं हरिं ध्याये।२५। अत्र दत्तात्रेयाय परिवारैः सह अर्चने श्रद्धा+भक्त्या आह्वयामि। (हे) विभो ध्यात+धाम्ना अञ्जसा आगच्छ।२६। (हे) दत्त, सौवर्णं रत्नजडितं रम्यं देवतामयं सिंहासनं कल्पितम्। तत्र यंत्रिते (सिंहासने) उपविश।२७। चंदन+कर्पूर+सुरभि+स्वादु वारि ते पाद्यं कल्पितं, तेन (हे) दत्त, ते अङ्घ्री क्षालयामि।२८।

**मानसमूर्तीची षोडशोपचार पूजा** - **(प्रबोध)** आपल्या चित्ताकर्षक आणि सुंदर कीर्तीचे गुणगान असलेल्या गीतांनी, हे दत्तप्रभू, आपण जागे व्हा आणि हे भक्तवत्सला ह्या मानसपूजेत माझ्यासमीप रहा.२४. **(ध्यान)** सिद्धासनावर बसून खेचरी मुद्रा धारण केलेल्या तसेच हातांनी वर आणि अभय दर्शविणाऱ्या योग्यांच्या सद्गुरु श्रीदत्तांचे मी ध्यान करतो. इथे द्विभुज मूर्तीचे ध्यान अभिप्रेत दिसते. स्तुतीच्या अंतींचे सविस्तर ध्यानही दिगंबर आणि द्विभुज असेच आहे.२५. **(आवाहन)** श्रीदत्तात्रेयांना परिवारासह ह्या पूजेसाठी मी श्रद्धेने आणि भक्तीने आवाहन करतो. हे सर्वव्यापी देवा, आपण शीघ्र या ध्यानमूर्तींत या.२६. **(आसन)** हे दत्ता, मी आपल्यासाठी हे सुवर्णाचे, देवतामय, यंत्रयुक्त रम्य सिंहासन कल्पिलेले आहे. त्यावर विराजमान व्हा.२७. **(पाद्य)** चंदन, कापूर आणि केशर यांनी युक्त असे हे मधुर जल आपल्यासाठी पाद्य म्हणून कल्पिले आहे. त्याने आपले पाय मी धूत आहे.२८.

**गन्धाब्जतुलसीबिल्व-शमीपत्राक्षतान्वितम् । साम्ब्वर्घ्यं स्वर्णपात्रेण कल्पितं दत्त गृह्यताम् ।।२९।।**
**सुस्वाद्वाचमनीयाम्बु हैमपात्रेण कल्पितम् । तुभ्यमाचम्यतां दत्त मधुपर्कं गृहाण च ।।३०।।**
**पुष्पवासितसत्तैलमंगेष्वालिप्य दत्त भोः । पंचामृतैश्च गांगाद्भिः स्नानं ते कल्पयाम्यहम् ।।३१।।**
**भक्त्या दिगंबराचान्तजलेदं दत्त कल्पितम् । काषायपरिधानं तद् गृहाणैणेयचर्म च ।।३२।।**
**नानासूत्रधरैते ते ब्रह्मसूत्रे प्रकल्पिते । गृहाण दैवतमये श्रीदत्त नवतन्तुके ।।३३।।**

गन्ध+अब्ज+तुलसी+बिल्व+शमी+पत्र+अक्षता+अन्वितं सु+अम्बु स्वर्ण+पात्रेण कल्पितं (हे) दत्त, गृह्यताम्।२९। (हे) दत्त! तुभ्यं सुस्वादु आचमनीयं अम्बु हैम+पात्रेण कल्पितम्, आचम्यताम्। मधुपर्कं च गृहाण।३०। भोः दत्त! पुष्प+वासित सत्+तैलं अङ्गेषु आलिप्य। पंचामृतैः च गाङ्ग+अद्भिः अहं ते स्नानं कल्पयामि।३१। (हे) दत्त, भक्त्या कल्पितं इदं जलं आचान्त, काषाय+परिधानं तत् ऐणेय+चर्म च गृहाण।३२। (हे) नाना+सूत्र+धर श्रीदत्त, एते ते दैवतमये नवतन्तुके प्रकल्पिते ब्रह्मसूत्रे गृहाण।३३।

**(अर्घ्य)** गंध, अक्षता, बेल-तुलसी-शमी यांच्या पानांनी तसेच कमलाने युक्त पाण्याचे अर्घ्य मी सुवर्णपात्रांत कल्पिले आहे. ते आपण ग्रहण करा.२९. **(आचमन)** सोन्याच्याच कलशांत कल्पिलेले हे मधुर जल आपल्या आचमनासाठी आणले आहे. त्यांनी आचमन करून हा मधुपर्क घ्या.३०. **(स्नान)** हे दत्ता, विविध फुलांनी सुगंधित असे हे तेल आपल्या अंगाला लावून घ्या. पंचामृताने आणि गंगोदकाने आपल्याला मनाने न्हाऊं घालत आहे.३१. **(वस्त्र)** स्नानोत्तर मी भक्तीने कल्पिलेल्या ह्या पाण्याने आचमन करून हे भगवे वस्त्र धारण करा आणि हे मृगचर्म घ्या.३२. **(यज्ञोपवीत)** नानासूत्रधारी श्रीदत्ता, दैवतमय असे नऊ तंतूंचे मी कल्पनेने केलेले यज्ञोपवीत धारण करा.३३.

**भूतिमृत्स्नासुकस्तूरी-केशरान्वितचंदनम् । रत्नाक्षताः कल्पितास्त्वामलङ्कुर्वेऽथ दत्त तैः ।।३४।।**
**सच्छमीबिल्वतुलसी-पत्रैः सौगंधिकैः सुमैः । मनसा कल्पितैर्नानाविधैर्दत्तार्चयाम्यहम् ।।३५।।**
**लाक्षासिताभ्रश्रीवास-श्रीखण्डागरुगुग्गुलैः । युक्तोऽग्नियोजितो धूपो हृदा स्वीकुरु दत्त तम् ।।३६।।**
**स्वर्णपात्रे गोघृताक्त-वर्तिप्रज्वालितं हृदा । दीपं दत्त सकर्पूरं गृहाण स्वप्रकाशक ।।३७।।**
**सषड्रसं षड्विधान्नं नैवेद्यं गव्यसंयुतम् । कल्पितं हैमपात्रे ते भुंक्ष्व दत्तांब्वदः पिब ।।३८।।**

(हे) दत्त, भूति+मृत्स्ना+सुकस्तूरी+केशर+अन्वित+चन्दनं रत्न+अक्षताः (च) त्वां कल्पिताः। अथ तैः अलङ्कुर्वे।३४। (हे) दत्त, मनसा कल्पितैः सत्+शमी+बिल्व+तुलसी+पत्रैः, नानाविधैः सौगन्धिकैः सुमैः अर्चयामि।३५। (हे) दत्त! हृदा लाक्षा+सिताभ्र+श्रीवास+श्रीखंड+अगरु+गुग्गुलैः धूपः अग्निना योजितः। तं स्वीकुरु।३६। (हे) स्वप्रकाशक दत्त, हृदा स्वर्ण+पात्रे गो+घृत+आक्त+वर्ति+प्रज्वालितं सकर्पूरं दीपं गृहाण।३७। स+षड्+रसं गव्य+संयुतं षट्+विध+अन्नं हैमपात्रे ते नैवेद्यं कल्पितम्। (हे) दत्त, भुङ्क्ष्व, अदः अम्बु पिब।३८।

**(गंधाक्षता)** हे दत्ता, भस्म, मृत्तिका, कस्तूरी, केशर यांचे बनविलेले चंदन आणि ह्या रत्नाच्या अक्षतांनी आपण अलंकृत व्हा.३४. **(पुष्प)** दत्तराज, मनानेच कल्पिलेल्या उत्तम शमी, बिल्व आणि तुलसी यांच्या पानांनी आणि नानाविध सुगंधित पुष्पांनी मी आपली पूजा करीत आहे.३५. **(धूप)** लाख, अभ्रक, श्रीवास (वृकधूप), चंदन, अगरु आणि गुग्गुळ यांच्यापासून हा मनाने केलेला धूप मी जाळीत आहे. त्याचा स्वीकार करा.३६. **(दीप)** हे स्वयंप्रकाश प्रभो, गाईच्या तुपांत भिजवलेल्या वातींनी मनानेच उजळलेला हा दीप आणि कापूर यांचा स्वीकार करा.३७. **(नैवेद्य)** भक्ष्य (घागरे, अनारसे इत्यादि), भोज्य (पायस, खीर वगैरे), लेह्य (गूळ, मध, श्रीखंड इत्यादि), चोष्य (ऊंसाच्या कांड्यासारखे), पेय (पन्हे, सार इ.) आणि चर्व्य (पापड, कुरुड्या, सांडगे इ.) असे सहा प्रकारचे, तसेच मधुर, खारट, तिखट, कडू, आंबट आणि तुरट अशा सहा रसांनी युक्त असलेले हे अन्न मी सोन्याचा ताटांत मनानेच वाढले आहे ते भक्षण करा.३८.

**प्रक्षाल्यास्यं करौ चाद्भिर्दत्ताचम्य प्रगृह्यताम् । तांबूलं दक्षिणां हैमीं कल्पितानि फलानि च ।।३९।।**

**नीराज्य रत्नदीपैस्त्वां प्रणम्य मनसा च ते । परितस्त्वत्कथोद्घातैः कुर्वे दत्त प्रदक्षिणाः ।।४०।।**

**मन्त्रवन्निहितो मूर्ध्नि दत्त ते कुसुमाञ्जलिः । कल्प्यन्ते मनसा गीत-वाद्यनृत्योपचारकाः ।।४१।।**

**प्रेर्यमाणप्रेरकेण त्वया दत्तेरितेन ते । कृतेयं मनसा पूजा श्रीमंस्तुष्टो भवानया ।।४२।।**

**दत्त मानसतल्पे मे सुखनिद्रां रहः कुरु । रम्ये व्यायतभक्त्यामतूलिकाढ्ये सुवीजिते ।।४३।।**

(हे) दत्त, आस्यं करौ च प्रक्षाल्य, आचम्य । कल्पितानि ताम्बूलं, हैमीं दक्षिणां, फलानि च प्रगृह्यताम्।३९। (हे) दत्त, त्वां मनसा रत्न+दीपैः नीराज्य, ते प्रणम्य च, त्वत् परितः त्वत्+कथा+उद्धातैः प्रदक्षिणाः कुर्वे।४०। (हे) दत्त, ते मूर्ध्नि मन्त्रवत् कुसुम+अञ्जलिः निहितः। गीत+वाद्य+नृत्य+उपचारकाः मनसा कल्प्यन्ते।४१। (हे) दत्त, मे रम्ये व्यायत+भक्ति+आम+तूलिका+आढ्ये मानस+तल्पे रहः सुख+निद्रां कुरु।४२। (हे) दत्त, प्रेर्यमाण+प्रेरकेण त्वया ईरितेन इयं पूजा मनसा कृता। (हे) श्रीमन्, अनया तुष्टः भव।४३।

**(फल-तांबूल-दक्षिणा)** भोजनोत्तर हात धुवून हे पुन्हा आचमन घ्या आणि मनाचेच विडा, सोन्याची दक्षिणा आणि फळ स्वीकारा. ३९. **(आरती-प्रदक्षिणा)** हे दत्ता, (मनाच्याच) रत्नदीपांनी तुला नीरांजन करून नमस्कार करतो आणि तुझ्या कथांचे गान करीत तुझ्याभोवती प्रदक्षिणा करतो.४०. **(मंत्रपुष्प-राजोपचार)** मंत्रघोषासहित ही पुष्पांजली आपल्या मस्तकावर वाहून गीत, वाद्य, नृत्य हे उपचारही मनानेच कल्पिले आहेत.४१. **(समर्पण)** आम्हां सर्वांना स्फूर्ती देणाऱ्या श्रीमंत दत्ता, सर्वांतर्यामि अशा तुझ्याच प्रेरणेने ही मानसपूजा केली. तिने तू प्रसन्न हो.४२. **(विसर्जन)** हे दत्तसखया, माझ्या मनोरूपी पलंगावर घातलेल्या विशाल भक्तिरूप कोमल गादीवर आपण सुखाने पहुडा. हा प्राणवायू आपल्याला विंझण करीत आहे.४३.

## क्षमापराधन

**रसज्ञावशा तारकं स्वादु लभ्यं गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४४।।**
**वियोन्यन्तरे दैवदार्ढ्याद्विभो प्राग्, गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४५।।**
**मया मातृगर्भस्थितिप्राप्तकष्टाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४६।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, रसज्ञा वशा, तारकं स्वादु लभ्यं ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४४। (हे) विभो वियोनि+अन्तरे दैव+दार्ढ्यात् प्राक् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४५। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया मातृ+गर्भ+स्थिति+प्राप्त+कष्टात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४६।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, माझी जिह्वा स्वाधीन असूनही, मी आपले सहजसुलभ, तारक आणि गोड नाम कधीच घेतले नाही. ह्या माझ्या कायिक, वाचिक आणि मानसिक अपराधांची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४४.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, पूर्वजन्मीं मानवेतर योनीत असतांना दुर्दैवाने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४५.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी मातेच्या कुशीत गर्भयातना भोगीत असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४६.

**मया जातमात्रेण संमोहितेन गृहीतं  कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४७।।**
**मया क्रीडनासक्तचित्तेन बाल्ये गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४८।।**
**मया यौवनेऽज्ञानतो भोगतोषाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४९।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया जातमात्रेण संमोहितेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४७। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया बाल्ये क्रीडन+आसक्तेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४८। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया यौवने अज्ञानतः भोग+तोषात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४९।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, नवजात अवस्थेत कशाचीच शुद्ध नसल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४७.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, बालपणी खेळांतच निमग्न असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४८.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, तारुण्यावस्थेत अज्ञानवश भोगासुखांतच रमून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४९.

**मया स्थाविरेऽनिघ्नसर्वेन्द्रियेण गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५०।।**
**हृषीकेश मे वाङ्मनःकायजातं हरेऽज्ञानतो ज्ञानतो विश्वसाक्षिन् ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५१।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया स्थाविरे अनिघ्न+सर्व+इन्द्रियेण ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५०। (हे) हृषीकेश, हरे, विश्व+साक्षिन्, क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मे ज्ञानतः अज्ञानतः (कायिक) अपराधं क्षमस्व, (वाचिक) अपराधं क्षमस्व, (मानसिक) अपराधं क्षमस्व।५१।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, म्हातारपणी माझा सर्व इंद्रियांवरचा ताबा सुटून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५०.

हे इंद्रियांच्या स्वामिन्, क्लेश हरण करणाऱ्या विश्वसाक्षी आर्द्रहृदय दत्ता, मी जाणता वा अजाणता काया, वाचा आणि मनाने केलेल्या अपराधांची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५१.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी ना तुझे कधी स्मरण केले, न ध्यान, न आवाहन, न पूजा! ना कधी तुझी स्तुति केली, ना गुणगान!! मी कधी तुला नमस्कारही केला नाही!!! ह्या माझ्या त्रिविध अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५२.

**स्मृतो ध्यात आवाहितोऽस्यर्चितो वा न गीतः स्तुतो वन्दितो वा न जप्तः ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५२।।**
**दयाब्धिर्भवादृङ् न सागाश्च मादृग् भवत्याप्तमन्तोर्भवान्मे शरण्यः ।।**
**यथालम्बनं भूर्हि भूनिस्सृतांघ्रे-रिति प्रार्थितं दत्तशिष्येण सारम् ।।५३।।**

(हे) क्लिन्न+चित्त प्रभो, (त्वं) मया न स्मृतः, न ध्यातः, न अर्चितः, वा न गीतः, न स्तुतः, न वन्दितः वा न जप्तः असि। (अतः तं) अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५२। भवादृक् दया+अब्धिः, मादृक् स+अगाः च न। भवति आप्त+मन्तोः मे भवान् (एव) शरण्यः, यथा भू+निःसृत+अङ्घ्रेः भूः हि आलम्बनं (अस्ति)। इति दत्त+शिष्येण सारं प्रार्थितम्।५३।

आपल्यासारखा दयासागर कोणी नाही आणि माझ्यासारखा पापी कोणी नाही! जमिनीवरून घसरून पडलेल्याला जमिनीचाच आधार असावा तसे आपलाच अपराधी असलेल्या माझा आश्रय आपणच आहांत! दत्तशिष्याने हा अभिप्राय प्रार्थनेने सादर केला.५३.

# अष्टोत्तरशतनाम.

(इथे भगवान दत्तात्रेयांची एकशे आठ अर्थगर्भ नांवे ‘द’च्या बाराखडीच्या आद्याक्षरांनी गुंफली आहेत.)

**दत्तं वन्दे दशातीतं दयाब्धिं दहनं दमम् । दक्षं दरघ्नं दस्युघ्नं दर्शं दर्पहरं दवम् ।।५४।।**
**दातारं दारुणं दांतं दास्यादं दानतोषणम् । दानं दावप्रियं दावं दासत्रं दारवर्जितम् ।।५५।।**
**दिक्पं दिवसपं दिक्स्थं दिव्ययोगं दिगम्बरम् । दिव्यं दिष्टं दिनं दिश्यं दिव्याङ्गं दितिजार्चितम् ।।५६।।**

दश+अतीतं, दया+अब्धिं, दहनं, दमं, दक्षं, दरघ्नं, दस्यु+घ्नं दर्शं, दर्प+हरं दवं दत्तं वन्दे।५४। दातारं, दारुणं, दान्तं, दास्यादं, दान+तोषणं, दानं, दाव+प्रियं दावं, दास+त्रं दार+वर्जितं (वन्दे)।५५। दिक्+पं, दिवसपं, दिक्+स्थं, दिव्य+योगं, दिक्+अम्बरं, दिव्यं, दिष्टं, दिनं, दिव्य+अङ्गं, दिति+ज+अर्चितम् वेन्दे।५६।

दशेंद्रियांच्या अतीत, दयेचे सागर, अग्निस्वरूप, दुष्टांचे (कामादि षड्रिपूंचे) दमन करणारा, भक्तरक्षणांत दक्ष, भयहारक, (भक्तांची हत्या करणाऱ्या) चोरांना मारणारा, (पितरांच्या तृप्तीसाठी) दर्शरूप (अमावास्येचे श्राद्ध), गर्वाचा नाश करणारा, *‘वन्याय च’* या श्रुतीनुसार वनस्वरूप अशा दत्ताला वंदन असो.५४. स्वतःचेही दान करणारा दानी, पापी लोकांना यमरूपाने भयावह, जितेंद्रिय, आपल्या भक्तांना विषयाच्या गुलामगिरीतून सोडविणारा, सत्पात्री दानाने संतुष्ट होणारा, सात्त्विक दानस्वरूप, वनविहारी, दावाग्निरूप, सेवकांचा पालक, पत्नीचे ग्रहण न करणारा संन्यासी (अशा दत्ताला वंदन असो.)५५. दिक्पालरूप, सूर्यस्वरूप, दिग्गजरूप, ईश्वरी योगाने युक्त, दिगंबर, देवरूप, कालात्मक, दिनरूप, दिशांमधून प्रकट होणारा, दिव्य शरीर धारण करणारा, प्रह्लादादि दैत्यांनी संपूजित (अशा दत्ताला वंदन असो.)५६.

**दीनपं दीधितिं दीप्तं दीर्घं दीपं च दीप्तगम् । दीनसेव्यं दीनबन्धुं दीक्षादं दीक्षितोत्तमम् ।।५७।।**
**दुर्ज्ञेयं दुर्ग्रहं दुर्गं दुर्गेशं दुःखभंजनम् । दुष्टघ्नं दुग्धपं दुःखं दुर्वासोऽग्र्यं दुरासदम् ।।५८।।**
**दूतं दूतप्रियं दूष्यं दूष्यत्रं दूरदर्शिपम् । दूरं दूरतमं दूर्वाभं दूराङ्गं च दूरगम् ।।५९।।**
**देवार्च्यं देवपं देवं देयज्ञं देवतोत्तमम् । देहज्ञं देहिनं देशं देशिकं देहिजीवनम् ।।६०।।**

दीन+पं, दीधितिं, दीप्तं, दीर्घं, दीपं च दीप्त+गुं, दीन+सेव्यं, दीन+बन्धुं, दीक्षा+दं, दीक्षित+उत्तमं (वन्दे)।५७। दुः+ज्ञेयं, दुः+ग्रहं, दुः+गं, दुर्गा+ईशं, (दुर्ग+ईशं), दुःख+भञ्जनं, दुष्ट+घ्नं दुर्वासः+अग्र्यं, दुः+आसदं (वन्दे)।५८। दूतं, दूत+प्रियं, दूष्यं, दूष्य+त्रं, दूर+दर्शि+पं, दूरं, दूरतमं, दूर्वा+आभं, दूर+अङ्गं च दूर+गं (वन्दे)।५९। देव+अर्च्यं, देव+पं, देवं, देय+ज्ञं, देवता+उत्तमं, देह+ज्ञं, देहिनं, देशिकं, देहि+जीवनं (वन्दे)।६०।

दीननाथ, किरणरूप, तेजस्वी, देदीप्यमान दृष्टीचा, दीनांना सेव्य, दीनबंधू, दीक्षादाता, दीक्षितांमध्ये श्रेष्ठ (अशा दत्ताला वंदन असो).५७. *‘गुहाहितं गह्वरेष्ठं’* या श्रुतीनुसार जाणण्यास कठीण, (मन, वाचा आणि इंद्रियें यांना) अप्राप्य, उमापति शिवस्वरूप किंवा मानवी शरीररूप दुर्गाचे रक्षण करणारा, दुःखभंजक, दुष्टसंहारक, (वांझ महिषी दुभती करून तिचे) दूध पिणारा, (स्वकर्मार्जित) दुःखस्वरूप, दुर्वासमुनींचा ज्येष्ठ भ्राता आणि दुष्प्राप्य (अशा दत्ताला वंदन असो).५८. (अग्निरूपाने देवांचा) दूत, (हनुमान, उद्धव आदि आपल्या) दूतांना प्रिय असणारा, वाळवंटांत राहुटीसारखा आश्रयभूत, पतितपावन, दूरदर्शी विद्वानांचा ईश्वर, इंद्रियांपासून दूर असलेला, बहिर्मुख जीवांना कोटिकल्पांतही अलभ्य, दूर्वांकुराप्रमाणे तेजस्वी, त्रैलोक्यव्यापी अशा विशाल देहाचा आणि दोन पायांत ब्रह्मांड ओलांडणारा (अशा दत्ताला वंदन असो).५९. देवांना पूज्य, देवांचा पालक, देवांचा देव, सर्वश्रेष्ठ दैवत, देहरूपी क्षेत्राचा ज्ञाता (क्षेत्रज्ञ), स्वमायेने लीलादेह धारण करणारा, शास्त्राज्ञास्वरूप, मार्गदर्शक गुरू, देहधाऱ्यांना जीवनस्वरूप (अशा दत्ताला वंदन असो).६०.

**दैन्यं दैन्यहरं दैवं दैन्यदं दैविकांतकम् । दैत्यघ्नं दैवतं दैर्घ्यं दैवज्ञं दैहिकार्तिदम् ।।६१।।**
**दोषघ्नं दोषदं दोषं दोषित्रं दोर्द्वयान्वितम् । दोषज्ञं दोहपं दोषेड्बन्धुं दोर्ज्ञं च दोहदम् ।।६२।।**
**दौरात्म्यघ्नं दौर्मनस्य-हरं दौर्भाग्यमोचनम् । दौष्ट्यत्रं दौष्कुल्यदोष-हरं दौर्हृद्यभञ्जनम् ।।६३।।**

दैन्यं, दैन्य+हरं, दैवं, दैन्य+दं, दैविक+अन्तकं, दैत्य+घ्नं, दैवतं, दैर्घ्यं, दैव+ज्ञं, दैहिक+आर्तिदं (वन्दे)।६१। दोष+घ्नं, दोष+दं, दोषं, दोषि+त्रं, दोः+द्वय+अन्वितं, दोष+ज्ञं, दोह+पं, दोषेड्+बन्धुं, दोः+ज्ञं, च दोहदं (वन्दे)।६२। दौरात्म्य+घ्नं, दौर्मनस्य+हरं, दौर्भाग्य+मोचनं, दौष्ट्य+त्रं, दौष्कुल्य+दोष+हरं, दौर्हृद्य+भञ्जनं (वन्दे)।६३।

दुष्कर्मकर्त्यांना दैन्यस्वरूप, भक्तांचे दैन्य हरण करणारा, कृतकर्मांचा फलस्वरूप, भाग्यहीनांना दैन्य देणारा, आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक तापांचे शमन करणारा, विष्णुरूपाने दैत्यांचा संहारक, दैवतस्वरूप, साक्षात महानता, ज्योतिषज्ञ, देहदुःख नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६१. भक्तांचा उद्धार करण्यासाठी त्यांचे चित्तदोष घालविणारा, पापी लोकांची मने दोषांनी युक्त करणारा तसेच त्यांच्या कर्मानुसार कफादि दोषस्वरूप, शरण आलेल्या अपराध्यांचा त्राता, द्विभुज (चतुर्भुज आणि षड्भुजही), सर्व जीवांचे दोष जाणणारा, (वंध्या महिषीचे) दोहन करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीचा पालक, चंद्राचा भाऊ, कोट्यवधी भुजांचा ज्ञाता, (व्रजांतील) गाईंचे दोहन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६२. दुःस्वभाव नाहीसा करणारा, मनाचे विकार दूर करणारा, दुर्भाग्याचे निवारण करणारा, (मनाच्या) दुष्टपणापासून रक्षण करणारा, कुलहीनत्वाचा दोष घालविणारा, हृदयाचे काठिण्य नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६३.

**दण्डज्ञं दण्डिनं दण्डं दम्भघ्नं दम्भिशासनम् । दन्त्यास्यं दन्तुरं दंशि-घ्नं दण्ड्यज्ञं च दण्डदम् ।।६४।।**
**अनन्तानन्तनामानि सन्ति तेऽनन्तविक्रम । वेदोऽपि चकितो यत्र नुर्वाग्हृद्दूर का कथा ।।६५।।**
**नामरूपगुणातीत भेदसङ्गविवर्जित । एक एवाद्वितीयोऽसि परमात्मन् हि नाकवत् ।।६६।।**

दण्ड+ज्ञं, दण्डिनं, दण्डं, दम्भ+घ्नं, दम्भि+शासिनं, दन्त्य+आस्यं, दन्तुरं, दंशि+घ्नं, दण्ड्य+ज्ञं च दण्ड+दं (वन्दे)।६४। (हे) अनन्त, अनन्त+विक्रम, ते अनन्त+नामानि सन्ति। यत्र वेदः अपि चकितः, (हे) वाक्+हृत्+दूर, नुः का कथा?।६५। (हे) नाम+रूप+गुण+अतीत, (हे) भेद+सङ्ग+विवर्जित, परमात्मन्, नाकवत् एक एव अद्वितीयः असि।६६।

दण्डनीतिज्ञ, दण्डधारी संन्यासी, अपराध्यांना दण्डस्वरूप, दंभहारक, दंभी माणसाला शासन करणारा, गजमुख अर्थात् गणेशस्वरूप, करालदंष्ट्र, मधमाशी इत्यादींची पीडा निवारणारा, शासनार्ह अपराध्यांना ओळखणारा तसेच त्यांना शासन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६४. हे अनंता, तुझे अगणित विक्रम असल्याने तुझी नावेही अनंत आहेत. वाणी आणि मनाला अगोचर असणाऱ्या देवा, वेदही जिथे चकित होतात तिथे मानवांची काय कथा?६५. नाम, रूप, गुण या सर्वांच्या पलीकडे असणाऱ्या, स्वगत, सजातीय आणि विजातीय भेद आणि मायासंग यांच्या वेगळा आकाशासारखा एकमेवाद्वितीय असा तू परमात्मा आहेस.६६.

**नामरूपगुणाभेदा मायासक्तिरनेकता । कल्पिता स्थूलधीभिस्ते महाकाशादिवद्विभो ।।६७।।**
**बहुरूपाप्रमेया ते मायैषा जगदीश्वर । मन्यते मेऽहमित्यस्या रममाणो गुणेष्वसौ ।।६८।।**
**कारणं त्विदमेवात्र जगद्विपरिवर्तने । येषां नाव्यक्त गम्योऽसि त्वमेव परमा गतिः ।।६९।।**

(हे) विभो! स्थूल+धीभिः ते नाम+रूप+गुणा भेदा मायासक्तिः अनेकता महा+आकाशवत् कल्पिता।६७। (हे) जगत्+ईश्वर, एषा बहुरूपा अप्रमेया ते माया। अस्या रममाणो असौ, अहं, मे इति मन्यते।६८। इदं एव अत्र जगत्+विपरिवर्तने कारणम्। (हे) अव्यक्त येषां त्वं एव परमा गतिः (इति) न गम्यः असि।६९।

नाम, रूप, गुण, भेद आणि मायेची आसक्ती हे सर्व स्थूलबुद्धीच्या (सगुणनिष्ठ) लोकांनी तुझ्या ठायीं कल्पिलेले आहेत. जसे एका महाकाशाचे ठायी जलाकाश, घटाकाश अशी नावे देऊन त्या त्या उपाधीच्या अनुषंगाने त्या त्या रूपाची, आकाराची कल्पना केली जाते. ही कल्पनाही तात्त्विक नसून अज्ञानमूलक कल्पनेचाच खेळ आहे. त्याचप्रमाणे किंवा ज्ञानी पुरुषांनी शुद्ध स्वरूप जाणण्यासाठी विकल्प किंवा त्याचा अभाव या दोन्हींनी अस्पृष्ट आत्मवस्तूला जाणण्यासाठी चंद्रशाखान्यायाने कल्पिलेल्या आहेत (पंचशील १:५२). हे जगदीश्वर, अंश आणि गुण यांच्या वैविध्याने नानारूपांनी नटलेली ही तुझी माया, कोणत्याही प्रमाणांनी जाणतां येत नाही; तिच्या कार्यावरून तिचे अनुमान करतां आले तरी ही खरी आहे की खोटी असा निश्चय करतां येत नाही. म्हणजेच ती अनिर्वचनीय आहे. ह्या मायेच्या गुणांत देहादिकांच्या अध्यासाने भुलून पुरुष मी आणि माझे ह्या मोहांत पडतो.६७-६८. हेच अहंकार आणि ममता जगाच्या सतत उलाढालीचे कारण आहे. पण हे अव्यक्ता, तूच त्यांची अंतिम गति आहेस हे ते जाणत नाहीत.६९.

**आसत्यलोका लोकास्ते पुनरावर्तिनोऽक्षर । तस्मात्त एव धन्याः स्युर्गृहीतं धाम यैस्तु ते ।।७०।।**
**नानुमानेन ते धाम ग्रहीतुं शक्यते ह्यतः । मृग्योऽसि पुरुषेणैव बुद्‌ध्यादिगुणहेतुभिः ।।७१।।**

(हे) अक्षर! ते आसत्यलोकाः लोकाः पुनः+आवर्तिनः। तस्मात् यैः ते धाम गृहीतं ते एव धन्याः स्युः।७०। ते धाम अनुमानेन ग्रहीतुं न शक्यते। अतः पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः असि।७१।

**ब्रह्मलोकाचे दोन प्रकारः-** परमश्रेष्ठ सत्य(ब्रह्म)लोकापर्यंतच्या, सर्वही लोकांपासून (मनुष्यदेहांत) परतावे लागते. (शंका) 'सत्यलोकाला जाणाऱ्या ब्रह्मज्ञाच्या स्वागतासाठी हातांत चामर, माला, अंजन, वस्त्र आणि फळे घेऊन शंभर शंभर अशा पांचशे अप्सरा धांवतात, त्याला ब्रह्मालंकाराने भूषवितात; असा ब्रह्मालंकृत ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप होतो. स्वाराज्य प्राप्त होऊन तो जीव ब्रह्मदेवाबरोबर कल्पांतीं मुक्त होतो' असे श्रुति आणि स्मृतींत वर्णन आहे. ब्रह्मसूत्रांतही (४-२-१०) ह्याची पुष्टी केलेली आहे. काठकश्रुतीतही (२-३-५) ब्रह्मलोकांत ऊनसावलीप्रमाणे ब्रह्मत्वाची स्पष्ट प्रतीति होते असे म्हटले आहे. मग अशा ब्रह्मलोकापासून पुन्हा भूलोकाला यावे लागते असे कसे म्हटले? या शंकेचे समाधान सांगतात. ब्रह्मलोक दोन प्रकारचा आहे. एक क्रममुक्तीच्या साधकांना मिळणारा आणि दुसरा पुण्यकर्माने मिळणारा. यांतील जे पुण्याईच्या बळावर ब्रह्मलोकांत जातात त्यांना त्यांच्या पुण्याचा उपभोग झाल्यावर पुनर्जन्म प्राप्त होतो; कारण त्यांनी ज्ञानाचे साधन केलेले नसते. ज्ञानप्राप्तीचा साधक मात्र ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतो असा अभिप्राय. अशा रीतीने ज्यांनी तुझे रूप आत्मभावाने ग्रहण केले, जे तुझ्याशी एकरूप झाले ते खरोखर धन्य होत.७०. ते तुझे स्वरूप तर्काने जाणतां येत नाही. (कारण अनुमानाने केवळ 'त्वं'पदाचा अर्थ कळूं शकतो.) त्यामुळे बुद्‌ध्यादिकांच्या साह्याने जागरूक राहणारा मानवच तुझा शोध घेऊं शकतो.७१.

**पुंस्त्वेऽप्यर्क इवान्धानां गोकल्पानामतीन्द्रिय । स्वप्नेऽपि नैव ते वार्ता पुनः प्रत्यक्षता कुतः ।।७२।।**
**प्रेष्ठत्वद्भक्तसंयोग-विवेकामलदृष्टिभिः । साङ्ख्ययोगपरैर्धीरैः क्रमात्ते धाम गम्यते ।।७३।।**
**तस्माद्दत्तं नृजन्मेदं त्वया दिष्ट्याऽमृतक्षमम् । सद्दृष्टिदानाद्भगवंस्तत्साफल्यं कुरु प्रभो ।।७४।।**
**त्वत्प्रेमभक्त्यैव सदा मदात्मा धिया धियं दृष्टिमपीश दृष्ट्या ।**
**अंगैः सदाङ्गानि दृढं दयाब्धे हरे निबध्नात्विति मेस्ति याच्ञा ।।७५।।**

(हे) अति+इन्द्रिय, पुंस्त्वे अपि गो+कल्पानां, अन्धानां अर्क इव, स्वप्ने अपि ते वार्ता न एव। पुनः प्रत्यक्षता कुतः?७२। प्रेष्ठ+त्वत्+भक्त+संयोग+विवेक+अमल+दृष्टिभिः साङ्ख्य+योग+परैः ते धाम क्रमात् गम्यते।७३। (हे) भगवन् इदं अमृत+क्षमं नृ+जन्म त्वया दिष्ट्या दत्तम्। (हे) प्रभो, सत्+दृष्टि+दानात् तत्+साफल्यं कुरु।७४। (हे) हरे, मत्+आत्मा त्वत्+प्रेम+भक्त्या एव, (मे) धियं (त्वत्) धिया, दृष्टिं अपि दृष्ट्या, अङ्गानि अङ्गैः सदा दृढं निबध्ना अस्तु इति याच्+ञा।७५।

हे इंद्रियातीत प्रभो, मानवांतसुद्धां जे पशुतुल्य आहेत त्यांना तुझी स्वप्नांतही वार्ता नसते; मग प्रत्यक्ष अनुभूतीची काय गोष्ट? साकार ब्रह्मनिष्ठाही दुर्लभ आहे मग मोक्षाची काय वार्ता असा भाव. कारण मोक्ष केवळ ज्ञानानेच प्राप्त होतो; त्याला दुसरा मार्गच नाही असे श्रुति (महावाक्योपनिषद् ३; श्वेताश्वतर उ. ३-८) म्हणते.७२. तुझ्या प्रियतम भक्तांचा सत्संग आणि विवेक ह्या दोन निर्मल डोळ्यांच्या साह्याने ज्ञानयोग आणि निष्कामकर्मयोग यांचे अनुष्ठान यमनियमादि साधनांसह करणाऱ्याना श्रवण-मनन-निदिध्यासनादि क्रमाने तुझे स्वरूप प्राप्त होते.७३. त्यासाठी हे भगवंता, दत्तप्रभो, आपण आमच्या भाग्याने हा मोक्षयोग्य मानवजन्म दिलेला आहे त्याचे साफल्य होण्यासाठी (वरीलप्रमाणे) निर्मल नेत्रांचे दान आपण करा.७४. हे हरे, तुझ्या प्रेमभक्तीने माझे मन, तुझ्या बुद्धीने माझी बुद्धी, दृष्टीने दृष्टी तसेच तुझ्या सर्व अंगांनी माझी अंगे सदैव निबद्ध असोत. तुझा आणि माझा परस्परवियोग अंशतःसु--दोर कधीच होऊं नये.७५.

**पादौ त्वदीयालयतीर्थयात्राविहारिणावर्चनतत्परौ मे ।**
**करौ रसज्ञापि भवत्वजस्रं सत्त्वत्कथोद्घातरसज्ञतोत्का ।।७६।।**
**त्वत्पादपद्मच्युतपुष्पगन्धं नासा भजत्वक्षियुगं गुणात्मन् ।**
**त्वन्मूर्तिमासेचनकां श्रुती मे श्राव्यास्त्वदीया भगवन्कथाश्च ।।७७।।**
**त्वदीयभक्ताङ्घ्रिमलाब्जपूतां धूलिं मदङ्गानि सदा वहन्तु ।**
**मनस्तुरङ्गो निवसत्वजस्रं त्वय्येव दीपोऽङ्ग यथा निवाते ।।७८।।**

मे पादौ त्वदीय आलय+तीर्थ+विहारिणौ, मे करौ अर्चन+तत्परौ, रसज्ञा अपि अजस्रं सत्+त्वत्+कथ+उद्घात+रसज्ञता+उत्का भवतु।७६। नासा त्वत्+पाद+पद्म+च्युत+पुष्प+गन्धं भजतु। (हे) गुण+आत्मन्, (मे) अक्षि+युगं आसेचनकां त्वत्+मूर्तिं भजतु।७७। (हे) भगवन्, मे श्रुतीः च त्वदीया श्राव्या कथाः (भजन्तुर)। मत्+अङ्गानि सदा त्वदीय+भक्त+अङ्घ्रि+अमल+अब्ज+पूतां धूलिं वहन्तु। तुरङ्गः मनः, यथा निवाते दीपः, अजस्रं त्वयि एव निवसतु।७८।

ह्या माझ्या शरीराचा विनियोग सर्वतोपरी तुझ्या सेवेतच व्हावा यासाठी प्रार्थना करतात. माझे मन तुझ्याच प्रेमभक्तीशी, बुद्धी तुझ्या बुद्धीशी, दृष्टी दृष्टीशी, सर्व अंगे तुझ्या अंगांशी सतत घट्ट जडलेले राहोत.७५. माझे पाय तुझ्याच मंदिरांच्या व तीर्थांच्या यात्रांत विचरण करोत. माझे हात तुझ्या पूजनांत तत्पर होवोत. माझी जिह्वा तुझ्या सत्कथांच्या गीतांचा स्वाद जाणून त्यांच्या उद्घोषासाठी सदैव आतुर असो.७६. माझे नाक तुझ्या पायांवरून पडलेल्या फुलांचा गंध सेवन करो. जिला पाहून मन कधी भरतच नाही अशी तुझी मनोहर मूर्ति सतत माझ्या दृष्टीसमोर राहो.७७. तुझ्या भक्तांच्या पदकमलांनी पवित्र झालेल्या धुळीने माझे शरीर सदैव माखलेले असो. सतत धांवणारा हा मनरूपी घोडा तुझ्या ठायी निवातींच्या दीपाप्रमाणे स्थिर राहो. वाऱ्याची झुळकही जेथे येत नाही अशा ठिकाणी दिव्याची ज्योत जशी निश्चळ राहते तसे संकल्पापासून निपजणाऱ्या सर्व कामांचा त्याग करून, अभ्यास आणि वैराग्य यांच्या बळाने हळू हळू उपरमलेले माझे चित्त तुझ्या ठायी स्थिर होवो. म्हणजेच धर्ममेघ नांवाच्या निर्बीज समाधीची सिद्धि होवो ही प्रार्थना.७८.

**शिरो नमत्वीश्वर तेऽङ्घ्रिपद्मं देहः सदाऽऽलिङ्गयतु त्वदर्चाम् ।**
**एषा त्वदीयैव तनुस्त्वमेव संबन्धिनो मे नहि केऽद्वितीय ।।७९।।**
**नूनं भवानृषिर्नैव न वर्णाश्रमलिङ्गभाक् । निर्मितं भवतैवेदं विश्वं स्वांशांशतोऽखिलम् ।।८०।।**
**न जानन्ति भवन्माया-मोहिता दिव्यमुत्तमम् । भवद्धामात एवैते भ्रमन्त्यसुरभावगाः ।।८१।।**

(हे) ईश्वर, शिरः ते अङ्घ्रि+पद्मं नमतु। देहः सदा त्वत्+अर्चां आलिङ्गयतु। एषा तनुः त्वदीय एव। (हे) अद्वितीय, त्वं एव मे सम्बन्धिनः, न हि के (अपि त्वत्तः अन्याः)।७९। भवान् ऋषिः न एव, न वर्ण+आश्रम+लिङ्ग+भाक्। भवता एव इदं अखिलं विश्वं स्व+अंशतः निर्मितम्।८०। भवत्+माया+मोहिताः दिव्यं उत्तमं भवत्+धाम न जानन्ति। अत एव ते असुर+भाव+गाः भ्रमन्ति।८१।

ईश्वरा, माझे मस्तक तुझ्याच चरणीं नत असो, माझा देह सतत तुझ्या मूर्तीच्या आलिंगनांत राहो. ही माझी तनु तुझीच आहे. अद्वितीया, तुझ्यावांचून कोणीही माझे नाही.७९. आपण म्हणाल की माझी एका ऋषिपुत्राची का एवढी आळवणी करतोस?' तर खरोखर आपण ऋषिपुत्र नाहीत. तसेच आपल्याला वर्ण, आश्रम, लिंग आदींचा कांही संबंध नाही. वर्णाश्रमादि देहाच्या ठिकाणी मायेने कल्पिलेले आहेत. आपण आत्मस्वरूप आहां. *'असंगो न हि सज्जते'* (बृहदारण्यक उपनिषद् ४-५-१५) ह्या श्रुतीनुसार त्याचा देहादि उपाधीशी कांही संबंध नाही. कूटस्थ प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार झालेलाही वर्णाश्रमलिंगाच्या पलीकडे जातो. आपण तर लीलेने देह धरला आहे. मग आपण वर्णाश्रमादींच्या अतीत आहे हे काय सांगायला हवे? आपणच ह्या नामरूपात्मक विश्वाचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहां आणि ब्रह्मदेवांच्या करवी आपणच हे जगत् रचले आहे.८०. आपल्या मायेने मोहून जाऊन असुरभावापन्न झालेले आपले उत्तम आणि दिव्य स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळेच ते संसारचक्रांत भ्रमण करतात.८१.

**कर्ता भर्तासि हर्ता त्वं प्रत्यक्षं तत्त्वमस्यपि । भो सर्वं खल्विदं ब्रह्म त्वमस्यात्मासि केवलम् ।।८२।।**
**त्वदुदेति रमत्येतद्विश्वं त्वय्येव लीयते । अष्टमूर्तिभिराभिस्त्वमाभासीव जगन्मयः ।।८३।।**
**दिक्पाला लोकपालाश्च श्रूयते दृश्यतेऽखिलम् । चराचरं जगल्लोका विष्णो तेऽवयवा अमी ।।८४।।**
**निगूढतत्त्व ते ज्ञातं यत्किञ्चिल्लोकदुर्ग्रहम् । चेष्टितं ते प्रसादोऽयं प्राक्पुण्यैर्मय्युपस्थितः ।।८५।।**

त्वं कर्ता, भर्ता, हर्ता, प्रत्यक्षं तत्त्वं अपि असि। भो त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म, केवलं आत्मा असि।८२। एतत् विश्वं त्वत् उदेति, रमति, त्वयि एव लीयते। त्वं अष्ट+मूर्तिभिः जगत्+मयः इव आभासि। (हे) विष्णो, दिक्+पालाः लोक+पालाः च अखिलं चर+अचरं जगत् (यत्) श्रूयते, दृश्यते, अमी ते अवयवयाः।८४। (हे) निगूढ+तत्त्व, ते लोक+दुः+ग्रहं चेष्टितं यत् किञ्चित् ज्ञातं अयं ते प्रसादः मयि प्राक्+पुण्यैः उपस्थितः।८५।

सगुणरूपाने तूच या सृष्टीचा कर्ता, पोशिंदा आणि संहर्ता आहेस. तूच प्रत्यक्ष तत्त्वस्वरूप आहेस. हे सर्व जग तूच आहेस; तुझ्याच अधिष्ठानावर ते भासत आहे. तूच परब्रह्म आहेस. हा श्लोक मंत्रगर्भ आहे.८२. *'यतो वा इमानि भूतानि...'* ह्या श्रुतिवचनानुसार (तैत्तिरीय उपनिषद् ३-१) हे सर्व जगत् तुझ्यापासून उदय पावते, तुझ्यांतच रमते आणि तुझ्यांतच विलीन होते. पृथ्वी, आप, अग्नि, सूर्य, चंद्र, वायु, आकाश आणि जीवात्मा ह्या अष्टमूर्तींच्या रूपाने भासणारा विश्वात्मक तूच आहेस (*'इव'* शब्दाने ते तत्त्वतः तसे नाही हे सूचित केले आहे.).८३. इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मदेवादि लोकपाल, सर्व चराचर जगत्, हे अनुभवाला येणारे जगत्, वेदांनी वर्णिलेले स्वर्गादि सप्तलोक, सप्तपाताल हे सर्व, हे विष्णो, तुझेच अवयव आहेत. कारण तूच विराट स्वरूपाने हे सर्व धारण करतोस.८४. हे निगूढतत्त्व (अविज्ञेयस्वरूप), लोकांना दुर्बोध असणाऱ्या तुझ्या लीला किंचित् मात्र मला समजल्या हा तुझाच प्रसाद होय.८५.

**सुखमैन्द्रियकं क्वापि न कांक्षे ते पदाश्रितः । नाकादीन्न प्रशंसामि नैव निन्दामि नारकान् ।।८६।।**

**यथेच्छं क्वापि मां कर्म-योगात्स्थापय विश्वभृत् । मां यत्र क्वापि ते भक्तिर्न जहात्विति काङ्क्षितम ।।८७।।**

**स्तुवन्तु निन्दत्वपि ताडयन्तु मां पूजयन्त्वत्र जना न वापि ।**

**देहः पतत्वद्य युगान्तरे वा न किञ्चिदिष्टं न च मेऽप्यनिष्टम् ।।८८।।**

**हृद्ध्यात्मेन्द्रियवाक्कायैः सदा प्रकृतिभावतः । यद्यत्करोम्यर्पयामि परात्मन्दत्त सर्व ते ।।८९।।**

ते पद+आश्रितः क्व अपि ऐन्द्रियकं सुखं न काङ्क्षे। नाकादीन् न प्रशंसामि, न एव नारकान् निन्दयामि।८६। (हे) विश्वभृत्, मां कर्म+योगात् यथा+इच्छं क्व अपि स्थापय, यत्र क्व अपि ते भक्तिः न जहातु इति काङ्क्षितम्।८७। जनाः मां स्तुवन्तु, निन्दन्तु, अपि वा ताडयन्तु, न वा पूजयन्तु; देहः अद्य, युग+अन्तरे वा पततु; मे न किञ्चित् इष्टं न च अपि अनिष्टम्।८८। (हे) पर+आत्मन् दत्त, हृत्+धी+आत्म+इन्द्रिय+वाक्+कायैः सदा प्रकृति+भावतः यत् यत् करोमि, सर्वं ते अर्पयामि।८९।

आपल्या पदांचा आश्रय लाभल्यावर आतां मी कसल्याही ऐंद्रिय (भौतिक) सुखाची इच्छा करीत नाही. मी न स्वर्गादिकांना नावाजतो न नरकांची निंदा करतो.८६. हे जगाच्या पोषका, कर्मयोगानुसार (माझ्या कर्मगतीनुसार) मला जिथे कुठे ठेवायचे ते ठेव. तुझ्या भक्तीला मात्र मी कधी पारखा होऊ नये हीच माझी प्रार्थना आहे.८७. लोक माझी स्तुति करोत की निंदा; माझी पूजा करोत की मला चोप देवोत; हा देह आजच पडो वा युगानंतर! मला कांही इष्ट नाही की अनिष्ट नाही.८८. हे दत्त परमात्मन्, मनाने, बुद्धीने, शरीराने वा स्वाभाविक प्रकृतीने मी जे जे करतो ते सर्व तुला अर्पण असो. मन, बुद्धी, अहंकार, दहा इंद्रिये, वाचा (विशिष्ट वाचिक कर्माच्या निर्देशासाठी वेगळा उल्लेख) आणि काया तसेच स्वभावतः जी लौकिकादि कर्मे मी करतो ती सर्व हे दत्ता, तुला समर्पण करतो.८९.

**लीलात्मना योऽत्रिगृहेवतीर्णो दत्ताख्य उन्मत्तपिशाचवद्यः ।**
**बालो युवा क्वापि जरन्जटाभृत् क्वचिदृषिर्व्यक्तपरीक्षितश्च ।।९०।।**
**त्यागी सुभोगी क्वचिदस्ति संगी योगी सुवासाः क्वचिदस्ति नग्नः ।**
**तुष्टः कृशः पुष्ट इह क्वचिद्यो दंडी च भिक्षुः क्वचिदस्ति वर्णी ।।९१।।**
**गृही वनी वर्णविरुद्धचेष्टः क्वचिच्च वर्णाश्रमधर्मयुक्तः ।**
**इत्यादयो यस्य विचित्रचेष्टा देवर्षिहृद्वागयनं व्यतीताः ।।९२।।**

यः दत्त+आख्यः लीला+आत्मनः अत्रि+गृहे अवतीर्णः, यः उन्मत्त+पिशाचवत्, बालः, युवा, क्व अपि जटा+भृत् जरन्, क्वचित् व्यक्त+परीक्षितः ऋषिः, त्यागी, सुभोगी, क्वचित् संगी अस्ति, (क्वचित्) सुवासाः क्वचित् नग्नः अस्ति; यः इह क्वचित् तुष्टः, कृशः, पुष्टः; क्वचित् दंडी भिक्षुः (क्वचित्) वर्णी अस्ति।९१। क्वचित् गृही, (क्वचित्) वर्णी, वर्ण+विरुद्ध+चेष्टः क्वचित् च वर्ण+आश्रम+धर्म+युक्तः। यस्य इत्यादयः विचित्र+चेष्टाः देव+ऋषि+हृत्+वाक्+अयनं व्यतीताः।९२।

जो अत्रींच्या घरांत लीलादेह धारण करून अवतरला; (जो) भक्तांची परीक्षा पाहण्यासाठी (ज्ञान व ऐश्वर्य यांनी संपन्न असूनही) बाल, उन्मत्त आणि पिशाचवत् वर्तन करतो; कधी बाल, कधी युवा, कधी जटाधारी वृद्ध तर कधी लोकांनी प्रकट पाहिलेला ऋषि; कधी योगी, कधी उत्तम वेषांत तर कधी नग्न; कधी तुष्ट, कधी पुष्ट तर कधी कृश; कधी दंडधारी संन्यासी, कधी भिक्षु (दंडरहित परमहंस), कधी ब्रह्मचारी, कधी गृहस्थ, कधी वानप्रस्थ, कधी वर्णाश्रमांच्या विरुद्ध वागणारा तर कधी परत वर्णाश्रमांना धारण करणारा; इत्यादि ज्याच्या अनेक प्रकारच्या अदभुत लीला देव आणि ऋषींच्यासुद्धां मन आणि वाचा यांना न आकळणाऱ्या आहेत (मानवांचा काय पाड?).९०-९२.

**यो भक्तरक्षाक्षण एव यस्य वै सेवा स्मृतिर्भोज्यनिवेदनं धिया ।**
**पूजाफलं योऽर्पयतीह दुर्लभं भक्तस्मृतौ संनिधिकृत्क्षणे क्षणे ।।९३।।**
**यस्यास्ति माहुरे निद्रा निवासः सह्यपर्वते । भागीरथ्यां सदा स्नानं ध्यानं गन्धर्वपत्तने ।।९४।।**
**कुरुक्षेत्रे चाचमनं धूतपापेश्वरे तथा । विभूतिधारणं संध्या करहाटे श्रियः पुरे ।।९५।।**
**भिक्षा विठ्ठलपुर्यस्य सुगन्धिद्रव्यधारणम् । भुक्तिः सारपुरे सायं-संध्या पश्चिमसागरे ।।९६।।**

यः भक्त+रक्ष+क्षणः, यस्य वै स्मृतिः एव सेवा, धिया भोज्य+निवेदनं पूजा, यः इह दुर्लभं फलं अर्पयति, भक्त+स्मृतौ संनिधि क्षणे क्षणे संनिधि+कृत्।९३। यस्य निद्रा माहुरे अस्ति, निवासः सह्य+पर्वते, सदा भागीरथ्यां स्नानं, गन्धर्व+पत्तने ध्यानं, कुरुक्षेत्रे च आचमनं, तथा धूतपापेश्वरे विभूतिधारणं, करहाटे संध्या, श्रियः पुरे भिक्षा, अस्य विठ्ठलपुरि सुगन्धि+द्रव्य+धारणं, सारपुरे भुक्तिः, पश्चिम+सागरे सायं+संध्या (अस्ति)।९४-९६।

आपल्या भक्तांचे रक्षण करणे हाच ज्याचा आनंदोत्सव आहे, केवळ स्मरण हीच ज्याची सेवा आहे, आपले अन्न (स्वतः सेवन करण्याआधी) त्याला भक्तीने समर्पण करणे हीच ज्याची पूजा आहे आणि अशा अर्चकांच्या भक्तीने प्रसन्न होऊन जो तपादिकांनीही दुर्लभ असे फळ देतो. भक्तांनी स्मरतांच त्यांच्या निकट उभा राहणारा (तो दत्त परमात्मा).९३.

### दत्तात्रेयांची दिनचर्या.

जो माहूरगडावर झोंपतो, सह्यशिखरावर राहतो, गंगाभागीरथींत नित्य स्नान करतो, गाणगापुरीं ध्यान करतो, कुरुक्षेत्रांत आचमन करतो, (हिमालयाच्या पायथ्याशी) धूतपापेश्वरला भस्म धारण करतो, कऱ्हाडला संध्या करतो, कोल्हापुरामध्ये भिक्षा करतो, पंढरपुरामध्ये सुगंधि द्रव्य धारण करतो, पांचालेश्वरीं भोजन करतो आणि पश्चिमसागराच्या तटावर सायंसंध्या करतो.९४-९६.

**स एष भगवान्दत्तः सदा वसतु मे हृदि । हृद्धीन्द्रियादिव्यापारे सदा तत्स्मृतिरस्तु मे ।।९७।।**
**पादादि मूर्धपर्यन्तमेतद्वै भौतिकं वपुः । परिरक्षतु विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः ।।९८।।**
**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यदृग्योपि शृणोत्यकर्णः ।**
**यो वेत्ति वेद्यं न हि यस्य वेत्ता सोऽग्र्यः प्रधानः पुरुषो हि दत्तः ।।९९।।**

सः एषः भगवान् दत्तः सदा मे हृदि वसतु। हृत्+धी+इन्द्रियादि+व्यापारे सदा मे तत् स्मृतिः अस्तु।९७। एतत् पादादि मूर्धपर्यन्तं भौतिकं वपुः विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः वै परिरक्षतु।९८। यः अ+पाणि+पादः ग्रहीता जवनः, अदृक् अपि पश्यति, अकर्णः शृणोति। यः वेद्यं वेत्ति। यस्य वेत्ता न हि। सः अग्र्यः प्रधानः पुरुषः दत्तः हि।९९।

तो हा भगवान् दत्त सदैव माझ्या अंतःकरणांत राहो, माझ्या मन, बुद्धी, इंद्रियें आणि देहाच्या सर्व क्रियांत मला त्याचे स्मरण राहो.९७. **कवच** - पायापासून मस्तकापर्यंत ह्या पांचभौतिक स्थूल आणि सूक्ष्म शरीराचे तो विश्वात्मक भगवंत सदा सर्व दिशांनी संरक्षण करो.९८. ज्याच्या सत्तेने थोटासुद्धां (देतो) घेतो, पांगळाही वेगाने धांवतो, आंधळा पाहतो, बहिरा ऐकतो; जाणण्यायोग्य सर्वांचा जो ज्ञाता आहे, पण त्याचा ज्ञाता कोणीही नाही (श्वेताश्वतर उपनिषद् ३:१९). कारण तो जाणीवेच्या पलीकडे आहे. तोही स्वतःला 'मी असा आहे', असे जाणत नाही. ह्यावर कुणी असे म्हणेल की मग तो सर्वज्ञ नाही तर तसे नाही. सशाचे शिंग माहीत नसल्याने सर्वज्ञत्वाला बाध येत नाही तसेच जाणीवेच्या पलीकडील स्वतःला न जाणल्याने परमात्म्याच्या सर्वज्ञत्वाला बाध येत नाही. तोच दत्त आद्य, श्रेष्ठ व अंतर्यामी पुरुष आहे.९९.

**आधारभूतः स्थिरजङ्गमानां क्षमास्वरूपस्थितिरस्ति नित्यम् ।**
**आप्यायते यो जगदप्स्वरूपी सर्वाघहृत्स्थास्नुचरिष्णु जीवः ॥१००॥**
**वैश्वानरात्माखिलदेहसंस्थः पचत्यसौ प्राणसखः सदान्नं ।**
**यो भास्वदात्माखिलकर्मसाक्षी विश्वं सदा चेतयते स्वभासा ॥१०१॥**

स्थिर+जङ्गमानां आधारभूतः क्षमा+स्वरूप+स्थितिः नित्यं अस्ति। यः सर्व+अघ+हृत् अप्+स्वरूपी जगत् आप्यायते। (यः) स्थास्नु चरिष्णु जीवः।१००। असौ अखिल+देह+संस्थः वैश्वानर+आत्मा प्राण+सखः सदा अन्नं पचति। यः भास्वत्+आत्मा अखिल+कर्म+साक्षी स्वभासा सदा विश्वं चेतयते।१०१।

**दत्तप्रभूचे अष्टमूर्तित्व** (श्लोक ८३ पहा.) सर्व चराचर सृष्टीचा आधार असणाऱ्या **पृथ्वी**च्या रूपाने तो नित्य स्थित आहे. तो **जल**रूपाने सर्व जगाची पुष्टि करतो, सर्व (कायिक, वाचिक, मानसिक) पापांचा नाश करतो तसेच सर्व स्थावर-जंगमांचा तो आत्मा आहे.१००. **जठराग्नी**च्या रूपाने सर्व देहांत (मानवांत त्रिकोणी, पशूंत चतुष्कोणी, पक्ष्यांत वर्तुलाकृति आणि मत्स्यादिकांत लंबवर्तुलाकार) राहून, हा (अपानसहित) प्राणाचा सखा सदैव अन्नाचे पचन करतो. अग्नीच्या वर पाणी आणि त्या पाण्यावर अन्न ठेवून, अग्नीच्या खाली स्वतः प्राण अग्नीला हळूंहळूं चेतवतो. *(ऊर्ध्वमग्नेर्जलं कृत्वाऽन्नं च जलोपरि। अग्नेश्चाधः स्वयं प्राणः स्थित्वाग्निं धमते शनैः।।* गरुडपुराण प्रेतखंड, धर्मकांड, ३२:४८-४९.) ह्या उक्त्यनुसार तसेच *अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्।।* (भ.गीता १५:१४) ह्या भगवद्वचनाला अनुसरून **सूर्या**च्या रूपाने आपल्या तेजाने सर्व विश्व सदा प्रकाशणारा, सर्व कर्मांचा साक्षी (हाच दत्तप्रभू आहे).१०१.

**योऽब्जो रसात्मा सकलौषधीर्वै पुष्णाति संतापहरोऽखिलेड्यः ।**
**क्षेत्रेषु भूत्वा दशधाखिलेषु प्राणात्मको यः पवतेऽखिलात्मा ।।१०२।।**
**आकाशरूपोऽखिलगोऽपि सौक्ष्म्याद्योऽभेदसङ्गः किल शब्दसंस्थः ।**
**भुनक्ति चोत्क्रामति तिष्ठतेऽपि मूढा विदुर्यं न सदात्मरूपं ।।१०३।।**

यः रस+आत्मा अब्जः संताप+हरः अखिल+ईड्यः वै सकल+औषधीः पुष्णाति। अखिलेषु क्षेत्रेषु दशधा भूत्वा यः प्राण+आत्मकः अखिलात्मा पवते।१०२। आकाश+रूपः अखिल+गः अपि सौक्ष्म्यात् यः अ+भेद+संगः किल शब्द+संस्थः भुनक्ति, उत्क्रामति च तिष्ठते अपि मूढा यं सत्+आत्म+रूपं न विदुः।१०३।

जो रसात्मक **चंद्र** होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो आणि जीवमात्रांचा दाह आपल्या शीतलतेने शमन करून सर्वांकडून स्तविला जातो. प्राणिमात्रांच्या देहांत दशधा होऊन (प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय) वाहणारा जो सूत्रात्मक **प्राण** आहे (*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्..* बृहदारण्यकोपनिषद् ३.७.२).१०२. जो आकाशरूपाने सर्वव्यापी, सूक्ष्मत्वाने अभेद आणि असंग आहे आणि ज्याच्या आश्रयाने शब्द राहतो. जीवरूपाने स्थित असलेल्या, सुखदुःखांचा भोग घेणाऱ्या आणि मृत्यूसमयीं देह सोडून जाणाऱ्या ज्याला अज्ञानी जाणत नाहीत. (*उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्। विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषा।।* (भ.गीता १५:१०).१०३.

**यः सर्वहृत्स्थोऽस्य यतः स्मृतिर्विद् वेदान्तकृद्योऽपि च वेदवेद्यः ।**
**समौ यदंशौ सयुजौ सुपर्णौ वृक्षाश्रितौ भुक्त्यवलोकनोत्कौ ।।१०४।।**
**स त्वं परात्मा पुरुषोत्तम श्रुति-ख्यातः समाविश्य जगत्त्रयं सदा ।**
**ईशाव्ययानन्त बिभर्षि दत्त ते पादाब्जयुग्माय नमोऽस्तु सर्वदा ।।१०५।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्क-युग्रक्ताब्जाभपत्तलः । गूढगुल्फः कूर्मपृष्ठोल्लसत्पादोपरिस्थलः ।।१०६।।**

यः सर्व+हृत्+स्थः यतः स्मृतिः वित्, यः अपि वेद+अन्त+कृत् च वेद+वेद्यः। वृक्ष+आश्रितौ यत्+अंशौ समौ, सयुजौ, सुपर्णौ भुक्ति+अवलोकन+उत्कौ।१०४। सः त्वं परात्मा पुरुष+उत्तमः श्रुति+ख्यातः (हे) ईश, (हे) अव्यय, (हे) अनन्त, (हे) दत्त जगत्+त्रयं समाविश्य बिभर्षि। ते पाद+अब्ज+युग्माय सर्वदा नमः अस्तु।१०५। वज्र+अङ्कुश+ध्वज+अब्ज+अङ्क+युक् रक्त+अब्ज+आभ+पत्+तलः, गूढ+गुल्फः कूर्म+पृष्ठ+उल्लसत् पाद+उपरि+स्थलः,।१०६।

जो सर्वांतर्यामी आहे, ज्याच्यापासून प्राणिमात्रांना स्मृती (पूर्वी अनुभवलेल्या विषयाचे स्मरण) आणि ज्ञान (विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगाची जाणीव) प्राप्त होतात, जो वेदांताचा कर्ता - ज्ञानदाता गुरू आणि संप्रदायाचा प्रवर्तक आहे आणि सर्व वेद विविध देवतारूपाने ज्याचे वर्णन करतात (किंवा जो उपनिषदांत वर्णन केलेला पुरुष आहे). चेतनत्वाने सम (सारख्या स्वभावाचे), सयुज (परस्पर मित्र), सुपर्ण (विश्वकोशानुसार उत्तम गति किंवा सहाय असलेले), गीतेने असंगशस्त्राने छेदण्यास सांगितलेल्या देहरूपी वृक्षाच्या (छेदनार्थी ओव्रूः धातूपासून वृक्ष) आश्रयाने राहणारे, कर्मफलांचा भोग भोगणारा जीव आणि साक्षित्वाने पाहणारा ईश्वर ज्याचे अंश आहेत.१०४. असा जो तो तूं परमात्मा; अचेतन अशा क्षर अशा पदार्थांचा चेतन आणि अक्षर नियंता असल्याने त्यांहून विलक्षण आणि म्हणूनच *'स वा अयमामात्मा', 'सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्यादिपतिः', 'सर्वमिदं प्रशास्ति'* इत्यादि श्रुत्यनुसार पुरुषोत्तम; वेदांनी प्रतिपादित, अव्यय आणि अनंत ईश्वर, त्रैलोक्य व्यापून त्याचे पालन करतोस. तुझ्या पदद्वयांना सतत वंदन असो.१०५.

**जानुपूर्वकजङ्घश्च विशालजघनस्थलः । पृथुश्रोणिश्च काकुत्स्थश्चारुनाभिर्दलोदरः ॥१०७॥**
**अररोरा मांसलांसो युगव्यायतबाहुकः । सुचिह्नचिह्नितकरः कम्बुकण्ठः स्मिताननः ॥१०८॥**
**स्नैग्ध्यधावल्ययुक्ताक्षश्चलत्-पिङ्गजटाधरः । चन्द्रकान्तिः प्रभुः कृष्ण-भ्रूरःश्मश्रुकनीनिकः ॥१०९॥**
**भावशुद्धद्विजाकीर्ण-स्वास्याब्जोऽभीवरप्रदः । दत्तात्रेयः स भगवान्सदा वसतु मे हृदि ॥११०॥**

जानु+पूर्व+जङ्घः च, विशाल+जघन+स्थलः, पृथु+श्रोणिः, च काकु+त्स्थः, चारु+नाभिः, दल+उदरः,।१०७। अरर+उरः मांसल+अंसः, युग+व्यायत+बाहुकः, सु+चिह्न+चिह्नित+करः, कम्बु+कण्ठः, स्मित+आननः,।१०८। स्नैग्ध्य+धावल्य+युक्त+अक्षः, चलत्+पिङ्ग+जटा+धरः, चन्द्र+कान्तिः, कृष्ण+भ्रू+उर+ श्मश्रु+कनीनिकः।१०९। भाव+शुद्ध+द्विज+आकीर्ण+सु+आस्य+अब्जः, अभी+वर+प्रदः, सः भगवान् दत्तात्रेयः प्रभुः सदा मे हृदि वसतु।११०।

**ध्यान -** (हे पायापासून आरंभ करून मुखापर्यंत केले आहे. प्रत्यक्ष पाहून केलेले हे वर्णन आहे. हे ध्यान दिगंबर असून ह्यांत कोणत्याही वस्त्र, आयुध किंवा आभरणांचा उल्लेख नाही. हे ध्यान द्विभुज आहे.) वज्र, अंकुश, ध्वजा आणि कमल या चिह्नांनी युक्त, लाल कमळाच्या रंगाचे तळवे असलेले, कांसवाच्या पाठीसारखे फुगीर वरचा भाग असलेले आणि टांचा झांकलेले ज्याचे पाय आहेत, मांडीच्या वरच्या भागावर एक पाय गंमतीने ठेवलेला आहे; प्रशस्त बैठक असलेला, दिगंबर, सुंदर नाभीसह पातळ पोट असलेला, कपाटासारखी रुंद छाती असलेला, मांसल बाहूंचा, विशाल बाहुद्वयांनी युक्त, ज्याचे हात शुभचिह्नांनी मंडित आहेत, ज्याचा गळा शंखासारखा तीन वलयांनी युक्त आहे, चेहऱ्यावर मधुर स्मित विलसत आहे, ज्याचे डोळे स्निग्ध आणि पांढरे आहेत, (कपाळावर) पिंगट जटा रुळत आहे, चंद्रासारख्या मनोहर कांतीचा, ज्याच्या भिंवया, छाती, दाढीमिशा आणि बुबुळे काळीं आहेत, स्वभावतः निर्मल अशा दंतपंक्तीने ज्याचे मुखकमल शोभत आहे असा आपल्या दोन हातांनी अभय आणि वर मुद्रा दर्शविणारा तो भगवान दत्तप्रभू सदैव माझ्या हृदयांत वास करो. श्रीदत्तात्रयवज्रकवचांत जवळजवळ हेच ध्यान आहे.१०६-११०.

**कलौ द्विराविरासीत्स दीनान्त्रातुं जनान्कलौ । सद्धर्मगुप्त्यै श्रीपाद-नरहर्यभिधानतः ।।१११।।**
**उड्डीयन्ते यथाशक्ति यथोच्चावचपक्षिणः । अनन्तेऽनन्तलीलां तन्न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।११२।।**

**।। इति श्रीगुरुचरिते श्रीगुरुस्तुतिः ।।**

सः कलौ दीनान् जनान् त्रातुं श्रीपाद+नरहरि+अभिधानतः कलौ द्विः आविरासीत्। यथा उच्च+अवच+पक्षिणः अनन्ते यथा+शक्ति उड्डीयन्ते तत् न्यायात् अनन्त+लीलां यथा+मति वक्ष्ये।

कलिकाळांतील दीन जनांचे रक्षण करण्यासाठी, तो श्रीपाद आणि नरहरी या नांवांनी साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी कलियुगांत दोन वेळां अवतरला.१११. असीम गगनांत लहान-मोठे पक्षी जसे आपापल्या कुवतीने भरारी घेतात त्याप्रमाणे मी त्या भगवंताच्या अनंत लीला माझ्या मतीनुसार सांगत आहे.११२.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील श्रीगुरुस्तुति इथे पूर्ण झाली.**
**ती श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)**

**ज्ञानयोगः ।**

**प्रथमोऽध्यायः ।**

**नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः । यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ।।१।।**

यत्+अज्ञानात् जगत् रज्जु+अहिवत् उदेति, यत्+तत्त्वं ज्ञानां मीलति तं चित्+आनंद+सत् गुरुं नौमि ।

आतां चरित्राला सुरुवात करतात. ॐ ***रचतो श्रीगुरुदत्तप्रेरणेने श्रीगुरुचरितार्थबोधिनी । पूर्वाचार्यमतानुसारी टीका पहावी निर्मत्सर सर्वांनी ।*** या भूलोकीं ही खरोखर विचित्र, अतिगंभीर आणि दुस्तर अशी माया आहे, जिच्यामुळे हे सर्व जीव परमार्थतः परमार्थरूप असूनही तसा बोध करूनही 'मी परमात्मा आहे' असे उमजत नाहीत. उलट घटादि जड पदार्थांप्रमाणे दिसणाऱ्या अनात्म अशा देह, इंद्रिय आदींच्या संघाताला आपले स्वरूप मानून 'मी ब्राह्मण, अमक्याचा पुत्र' इत्यादि कल्पना (कुणी) न सांगतांही करून घेतात. खरोखर परमात्म्याच्या मायेने भुललेले बहुतेक सर्वही लोक अशा भ्रमांत पडलेले असतात. ह्या भ्रमाच्या परिहारासाठीच मातापित्यांच्या शतपट श्रेष्ठ अशा श्रुतीमाउलीने (वेदरूपी मातेने) आणि परमकारुणिक भाष्यकार पूज्यपाद आचार्यांनी निरनिराळ्या प्रकारे समजावूनही, व्याधीमुळे गोडीसाठी कडुलिंबच सेवण्यास प्रवृत्त होणाऱ्या बालकासारखे, ज्यांचे चित्त विषयाकडे ओढले जाते अशा संसारी जीवांना तो बोध रुचत नाही. त्यासाठी खडीसाखरेसारखा सगुण ब्रह्माच्या प्रसादाच्या फलाद्वारे, त्या संसारी जीवांना आदरपूर्वक परमतत्त्वाकडे प्रवृत्त करण्यासाठी श्रीदत्तप्रभूंच्या प्रेरणेने आत्रेयगोत्री वासुदेव नांवाचा कोणी एक ब्राह्मण, वेदांचे सार ज्यांत आले आहे असा श्रीगुरुचरितम् ग्रंथ रचण्यासाठी, 'काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून, प्रारब्ध भोगूनच संपवून आणि नित्यकर्मांच्या अनुष्ठानाने प्रत्यवाय टाळून अनायासेच स्वरूपाची प्राप्ति हाच मोक्ष', किंवा 'निरतिशय प्रीतीने

स्वर्गादि शब्दांनी निदर्शिलेल्या लोकांची कर्मानेच प्राप्ति होत असल्याने कर्मानेच मोक्ष' इत्यादी पूर्वपक्षांचे निराकरण करून शेवटी 'अविद्या, काम आणि कर्म यांची निवृत्ती करून स्वस्वरूपांत स्थिरावणे हाच मोक्ष; स्वतः आत्माच ब्रह्म असल्याने त्याचे अपरोक्ष ज्ञान झाल्याने अविद्याची निवृत्ती म्हणजेच मोक्ष' ह्या आचार्योक्त्यनुसार साक्षात् मोक्ष देणारे ज्ञानकांडच प्रधान असल्याने, भगवद्‌गुणांसहित ज्ञानकांडाचे निरूपण करण्यासाठी, तसेच त्याच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठी शिष्टाचारानुसार, अनुष्टुभ छंदांत मंगलाचरण केले आहे. **प्रथमाध्यायीं श्रीगुरु स्तविला श्रीगंधर्वपुरी । नामधारका स्वप्नदर्शने कृपा करी ।।१।।**

ज्याच्या अज्ञानाने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे हे जग प्रकटते आणि ज्ञानी लोकांना जे तत्त्व पुनः मिळते त्या चिदानंद सद्‌गुरूंना मी वंदन करतो.

त्या चैतन्य, आनंद आणि सत्यस्वरूपी गुरूंना नमन करतो. कोण हा गुरू? ह्या प्रपंचरूपी आभासाचे अधिष्ठान, जगताचे उपादान कारण, स्वतःच्या माया नांवाच्या अनिर्वाच्य शक्तीने युक्त, सत्य, ज्ञान, अनंत आदि लक्षणांनी युक्त, दत्त नामक जो सर्वेश्वर, त्याच्या अज्ञानाने - अविद्याजनित व्यामोहाच्या बंधनाने, दोरीवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणे हे नामरूपात्मक जगत् उगवते, प्रकट होते. या ठिकाणी रज्जुसर्पाच्या दृष्टांताद्वारे वेदसंमत विवर्तवादाचाच अंगीकार केला आहे; आरंभवाद किंवा परिणामवादांचा नाही. त्यावरून आत्मा हा अवयव, अवयवी पदार्थांत गणला जात नसल्याने, तसेच त्याचे द्रव्यत्वही मानतां येत नसल्याने, त्याचा जगताशी समवाय अथवा संयोग संबंध होऊं शकत नाही, तर केवळ अध्यासच जाणावा. अशा अज्ञानापासूनच प्रपंचाची उत्पत्ति सांगितली. अशा प्रकारचे हे जगत् ज्याला न जाणल्याने (ज्याच्या अज्ञानाने) प्रकटते आणि **यत्तत्त्वं** ज्या (अज्ञानामुळे पसरलेल्या) जगताचे तात्त्विक स्वरूप **ज्ञानां** विवर्ताच्या (आभासाच्या) अधिष्ठानभूत परब्रह्माला अभेदाने जाणणाऱ्यांना **पुनर्मीलति** परत लोप पावते. त्याला नमस्कार करतो असा संबंध आहे. दोरी आणि सर्प यांचा दृष्टांत देहलीदीप न्यायाने दोन्हीकडे लागूं आहे. लौकिक

अनुभवांत दोरीचा विवेक केल्यावर जशी 'हा सर्प आहे' ही बुद्धी दूर होते, तसेच ज्यांना सच्चिदानंदाचा विवेक होतो त्यांचा तद्विपरीत जगदाभास *'यतो वाचो निवर्तन्ते'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मानंदवल्ली २:४) ह्या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे तो मिथ्या असल्याने नाहीसा होतो. हेच असे सांगतां येईल कीं विवर्तावर अध्यासलेले जगत् अज्ञानाचा विलास असल्याने दोरीवर  भासणाऱ्या सापासारखे मिथ्या होण्याच्याच योग्यतेचे आहे.

इथे एक अशी शंका उपस्थित होऊं शकते की जगताच्या उत्पत्तीचे कारण ब्रह्मदेव (किंवा प्रधान) आहेत असे वेदांत सांगितले आहे. तर इथे परमेश्वरापासूनच जगताची उत्पत्ति प्रतिपादिली आहे. याचे समाधान असे आहे. 'जो ब्रह्मादेवाला आधी निर्माण करतो (*यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम्*)' हे वेदवाक्य (श्वेताश्वतर उ. ६:१८) आणि *'गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे'* हे गीतावचन ब्रह्मदेव परमेश्वराचा शिष्य असल्याचे प्रतिपादन करतात. तसेंच *'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्'* (श्वेताश्वतर उ. ४:१०) ह्या  मंत्रानुसार माया ही परमेश्वराचीच शक्ती आहे आणि ती अचेतन आहे त्यामुळे परमेश्वरालाच जगदुत्पत्तीचे कारण मानावे लागेल.

**चित्** चैतन्यस्वभाव, जड नसलेला, स्वयंप्रकाश; निरतिशय, निरुपाधिक, नित्य आनंद सत्य, त्रिकालाबाधित असा हा गुरूच जगताच्या उत्पत्ति, स्थिति, लय यांचे कारण आहे; ब्रह्मा, प्रधान, अणू किंवा असत् हे नाहीत. शारीरकमीमांसेच्या दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत *'रचनानुपपत्तेच'* अशी सुरुवात करून आठ अधिकरणांत ह्या सर्व मतांतरवादांचे निराकरण केलेले आहे. ते तिथेच पहावे. त्याचप्रमाणे *'तस्माद्वा एतस्मादात्मान आकाशः संभूतः'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मवल्ली २.१), *'यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. भृगुवल्ली ३.१) हेच दर्शवितात.

इथे (**चिदानंदसद्** ह्या पदांत) संसर्ग वा विशिष्ट वाक्यार्थ न घेतां (श्रीमच्छंकराचार्यांनी) वाक्यवृत्तींत सांगितल्याप्रमाणे

(*संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र संमतः। अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषो मतः।।३८।।*) अखंडार्थ घ्यावा. गुरुशब्दाने दर्शविलेले *ब्रह्म चिदानंदसत्* ह्या शब्दांसहित अखंडैकरस जाणावेत. उदाहरणार्थ लोहितोष्णप्रकाशप्रदीप. लाल, उष्ण आणि प्रकाश हे दीपांत एकाच वेळी जाणवतात आणि त्यापासून अभिन्न असतात.

इथे जीवाचे संसारित्व आणि दुःखित्व हे नित्य आहे ह्या वादाच्या निरासासाठी पुनः शब्दाची योजना करून *'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'* (बृहदारण्यक उ. ४.४.६) ह्या वेदवाक्याचा अर्थ स्पष्ट केला आहे.

**ज्ञानाम्** हे अनेकवचन वापरून 'एकमुक्तौ सर्वमुक्तिप्रसंगः' ह्या पक्षाचे निरसन केले आहे. ज्ञ शब्दाने *'ज्ञोऽत एव'* (ब्रह्मसूत्र २.३.१८) ह्या अधिकरणन्यायाची पुष्टी केली आहे. ह्याने जीवाचे नित्यत्व, चिद्रूपत्व (ते अचिद्रूप - जड नाही) सुचविले आहे. कारण सुषुप्ति आदि अवस्थांतही तो साक्षित्वाने असतो. तर मग सुषुप्त्यादि अवस्थांत द्वैताची प्रतीती कां नसते? असे म्हणाल तर बृहदारण्यक उपनिषदांत (४.३.२२) 'यद्वै तन्न पश्यति' असे म्हटले आहे. किंवा *'यः सर्वज्ञः सर्ववित्'* (मुंडक उ. १.१.९) ह्या श्रुतीप्रमाणे **ज्ञ** शब्दाचा अर्थ ईश्वर असा करतां येईल. म्हणजेच ज्ञानी हा सर्वेश्वराहून वेगळा नाहीच. *'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति'* (मुंडक उ. ५.२.९) ह्या श्रुतीने आणि *'ज्ञानी त्वात्मैव मे मतः'* ह्या भगवद्वचनाने (भ.गीता ७.१८) ह्याचे समर्थन केले आहे.

हे शास्त्र आरंभणीय आहे की नाही असे विचाराल तर विषय आणि प्रयोजन असल्यामुळे *'अथातो ब्रह्मजिज्ञासा'* (ब्रह्मसूत्र १.१.१) या न्यायानुसार ते आरंभणीय आहे. सर्व अनर्थांचे मूळ असलेल्या प्रपंचाची निवृत्ती हे प्रयोजन आहे. तसेच ह्या प्रपंचरूपी विवर्ताचे अधिष्ठान जे ब्रह्म त्याचे ज्ञान हा विषय आहे. त्या(ब्रह्मज्ञाना)ची इच्छा करणारा साधनचतुष्टयसंपन्न ब्राह्मण हा अधिकारी आहे असे समजावे।।१।।

**भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया । विदास्यैक्यं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ।।२।।**

एकं सत् परं ब्रह्म धी+भेदात् अनेक+रूपया भाति। विदा अस्य ऐक्यं तत् सत्यं दत्त+संज्ञितम्।२।

एकच परब्रह्म असूनही बुद्धिवृत्तींच्या भेदांमुळे अनेकासारखे भासते. ह्याचे ज्ञानाने ऐक्य होते तेच दत्त नांवाचे सत्य होय. 'श्रेयांसि बहुविघ्नानि' ह्या उक्तीला अनुसरून *'एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः। एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत्।'* (त्रिपुरतापिनी उ. ५.१२), *'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'* (पैंगल १.१), *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०), *'नेह नानास्ति किंचन'* (बृहदारण्यक उ. ४.४.१९) ह्या वेदवाक्यांनी प्रतिपादिलेले ऐक्यात्म्य वस्तुनिर्देशात्मक (आणखी एका) मंगलाचरणाद्वारे सांगतात. *'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्'* (छांदोग्य उ. ६.२.१) ह्या श्रुतीने द्वैताचा निषेध करून प्रतिपादिलले **एकं** सजातीय आणि विजातीय भेदांनी रहित, **सत्** त्रिकालाबाधित देश, काल, वस्तु अशा कुठल्याही विभागणीच्या पलीकडील **परं ब्रह्म** परब्रह्म **धीभेदात्** अंतःकरणाच्या उपाधीमुळे, देव, मानव, पशु आदि अनेक रूपांनी **अनेकवत्** वि**भाति** भासते **तत्** ते खरे तर *'तत्त्वमसि'* (छांदोग्य उ. ६.८.७) ह्या उपनिषद्वाक्यानुसार एकच आहे.

**शंका -** सृष्टीच्या पूर्वी आपण म्हणतां तसे ते एकच असेलही. आतां स्थितीच्या काळांत सर्वांच्या अनुभवाच्या प्रत्यक्षादि प्रमाणानुसार सर्वांच्या प्रत्ययाला येणारे खाणे-पिणे इत्यादि व्यवहारांतले जगत् नामरूपात्मकच असून ते अनेकत्वानेच बनलेले आहे.

**समाधान -** भागत्यागलक्षणेच्या द्वारा **विदा** ज्ञानाने **अस्य** ह्या विद्यमान जगच्चालक व भासक सत्याचे **ऐक्यं** एकत्व *'अयमात्मा ब्रह्म'* (बृहदारण्यक उ. २.५.१९) ह्या श्रुतिवचनाप्रमाणे निर्बाध आहे.

**पर्यायी अर्थ -** किंवा असेही म्हणतां येईल की पहिल्या श्लोकाने तत्पदार्थ सांगितला आहे व ह्या दुसऱ्या श्लोकाने त्वंपदार्थ! **एकं** साक्षित्वाने जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनही अवस्थांत विद्यमान असणारे, **सत्** प्रत्यग्रूप, **धीभेदात्** (धी शब्दाचा इंद्रिय असा अर्थ करून) भिन्न भिन्न श्रोत्रादि इंद्रियांच्या शब्दादि विषयांच्या उपाधींमुळे **अनेकवत्** विखुरल्यासारखे भासते. प्रत्यक् रूप स्वभावतः शुद्ध असूनही मलिन उपाधींमुळे नाना रूपांनी नटल्यासारखे दिसते. जेव्हां उपाधिविशिष्ट गुणधर्मांना सोडून त्या त्या उपाधींच्या लक्ष्याचा शाखाचंद्रन्यायाने विवेक केला असतां उपाधिजनित अपकर्षाचा निरास होऊन प्रकृष्ट (आत्मरूपच) उरते. तेच चैतन्य श्रोत्रादि उपाधींत प्रवेशून ती ती कार्ये करतांना दिसले तरी उपाधिविशिष्ट चैतन्य गौण असून प्रत्यक् चैतन्यच मुख्य आहे. हाच विचार बृहदारण्यक उपनिषदांत (१.४.७) *'स एव(ष) देहे प्रविष्टः'* (तोच हा (जीव) देहांत प्रवेश करून) अशी सुरुवात करून *'तन्न पश्यांत्यकृत्स्नो हि स प्राणन्नेव हि प्राणनामको भवति वदन् वाक् पश्यंचक्षुः, शृण्वन् श्रोत्रं मन्वानो मन एतानि कर्मनामधेयानि भवन्ति'* असा विशद केला आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनी याचा असा अर्थ केला आहे. देहांत नखशिखांत प्रवेश करून ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या उपाधींचा आश्रय केलेल्या त्या आत्म्याला विवेकी पुरुष आपला आत्मा मानत नाहीत. कारण तो उपाधिविशिष्ट आत्मा एकसंध अविच्छिन्न नसतो. मग त्याला मुख्यात्मत्व कुठून येणार? प्राणचालनाने श्वासोछ्वास करतांना प्राणोपाधीच्या योगे तो प्राणनामक होतो. वाचा आदि उपाधींशी त्याचा संबंध तेव्हां नसतो. त्याचप्रमाणे एका एका उपाधीशी संलग्न असतांना तो इतरत्र जात नाही. जसे वाचेशी संलग्न असतांना तो चक्षु वा इतर उपाधीपासून दूर असतो. असा भिन्न भिन्न उपाधीच्या आश्रयाने तो विच्छिन्न भासतो. तर त्याला एकसंध वा अखंड कसे मानतां येईल? अशी शंका घेतल्यास त्याचे उत्तर असे आहे - शब्दादि उपाधिविशिष्ट भावांचा त्याग करून एकरूप **विदा** बुद्धीने **अस्य** ह्या प्रत्यगात्म्याचे **ऐक्यं** एकत्व कळते. बृहदारण्यकांतही म्हटले आहे *'आत्मानमेवोपासीत तर्ह्येके एकीभवन्ति'* (१.४.८). **तत्** ते एकत्वाने निचित केलेले **सत्यं** पूर्ण, निर्बाध, तत्त्वंपदार्थांच्या सामरस्याने अखंडैकरस **दत्तसंज्ञित** दत्त नामक पूर्ण ब्रह्म होय.

सूर्यपक्षी ह्या श्लोकाचा असा अर्थ लावतां येईल. *'एकैव वा महानात्मा देवता। स सूर्य इत्याचक्षते'* (कात्यायनकृत ऋग्वेदसर्वानुक्रमणिकांतर्गत द्वादशकांडी परिभाषा २.१४.१५) इत्यादींनी सांगितलेले सूर्यात्मक तेज *'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च'* (ऋग्वेद १.११५.१) याप्रमाणे **एकं सत्** एक असूनही *'इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुः'* (ऋग्वेद १.१६४.४६) इत्यादि श्रुतिप्रणीत देवतारूप **धीभेदात्** बुद्धीने *'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति'* (ऋग्वेद १.१६४.४६) या वेदवाक्यानुसार **अनेकवत् भाति** अनेक देवतारूप भासतो.

विष्णु, दत्तात्रेय, देवी, शिव यांच्या पक्षी **एकं सद्** त्या त्या देवतांचे एकच रूप वरच्या, खालच्या, उजव्या, डाव्या इत्यादि हातांनी धारण केल्या आयुधांच्या **धीभेदात्** निरनिराळ्या क्रमांच्या विचाराने **अनेकवत्** विभिन्न व्यूहांसारखा (केशव, नारायणादि) भासतो. त्यानुसार चतुर्भुज विष्णूचे २४, षड्भुज श्रीदत्तात्रेयाचे ७२०, अष्टभुजा देवीचे ४०३२० तर दशभुज शिवाचे ३५२८८०० भेद जाणावेत।।२।।

**बोद्धुं भूत्वात्रिपुत्रः स्वपदरसपरान्दिव्ययोगेन बालान् ।**
**दत्ताख्यः कार्तवीर्यं यदुमपि च समान्स्वाश्रितानुद्दधार ।**
**भूयोऽन्यान् श्रीपदाख्यः पुनरपि नृहरिः संज्ञया स्वीयभक्तान्।**
**कृष्णाभीमातटस्थो जयति परगुरुः स्मर्तृगाम्येष दत्तः ।।३।।**

स्व+पद+रस+परान् कार्तवीर्यं यदुं अपि च समान् स्व+आश्रितान् बालान् दिव्ययोगेन बोद्धुं दत्त+आख्यः अत्रिपुत्रः भूत्वा भूयः श्रीपद+आख्यः पुनः अपि नृहरिः स्वीय+भक्तान् उद्दधार। एष कृष्णा+भीमा+तट+स्थः पर+गुरुः स्मर्तृगामी दत्तः जयति।३।

आपल्या पदाच्या रसांत निमग्न असणाऱ्या, कार्तवीर्य आण यदु यांसारख्या आपल्याला शरण आलेल्या बालकांचा अत्रि मुनींच्या पोटी दत्त नांवाने अवतरून उद्धार केला. पुढेही श्रीपाद व नंतर नरहरि नाम धारण करून आपल्या इतरही भक्तांचा उद्धार करून तो परगुरु, स्मर्तृगामी दत्त कृष्णा आणि भीमा यांच्या तीरांवर विराजत आहे. हे (उपरिनिर्दिष्ट) वर्णन मुनिपुत्र दत्तात्रेयाला कसे लागूं पडेल ह्या शंकेच्या अपेक्षेने सांगतात. आपल्या षड्गुण ऐश्वर्यासह, स्वतःच्या शुद्ध चिदानंदैक स्वरूपानेच लोकशिक्षणासाठी - स्वात्मतत्त्वाच्या **बोद्धुं** उपदेशासाठी - उपासना, योग आदि उपायांनी प्राप्त होणाऱ्या स्वात्मतत्त्वाच्या ज्ञानासाठी *'अधीहि भगवो ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. ३.१.१) ह्या उक्तीप्रमाणे तसेच *'आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च'* या ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) **अत्रिपुत्रो भूत्वा** अत्रिमुनींच्या घरी अवतरून **स्वस्य पदं** पद्यते म्हणजे योग्यांना प्राप्त होते ते पद; देश-काल-वस्तु यांनी अपरिच्छिन्न असा जो चिन्मय आनंदरूपी रस, *'रसो वै सः'*, *'रसँ ह्येवायं लब्ध्वानन्दी भवती।'* (तैत्तिरीय उ. २.७.१) ह्या श्रुतींनी वर्णिलेला स्वरूपानंद; त्यांत निमग्न असलेल्या **बालान्** बालकाप्रमाणे मानावमानचिंतारहित निरागस वृत्ती धारण केलेल्या; सगुणपक्षी आपल्या चरणाच्या भजनाच्या आनंदांत मग्न असलेल्या व बालवत् विषयांत रमणाऱ्या, कृतवीर्याचा मुलगा **कार्तवीर्य** तसेच ययातिपुत्र **यदु** आणि **समान्** त्यांच्यासारख्या इतर सर्व **स्वाश्रितान्** आपल्या प्रह्लादादि भक्तांचा **दिव्ययोगेन** दिव्य म्हणजे ज्ञानात्मक उपनिषत्प्रणीत

योग म्हणजे उपाय. ह्या योगाचा अवलंब करणाऱ्यांचे गर्भावास, जन्म, जरा इत्यादी क्षीण होतात किंवा नाश पावतात आणि ते ब्रह्माकडे प्रगत होतात. ह्या योगाचा उगम उपनिषदांत असल्याने व वेदांनी ब्रह्माला औपनिषद पुरुष म्हटले असल्याने, (*'तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि।'* बृहदारण्यक उ. ३:९:२६) तो दिव्य योग आहे. उपनिषदांचे शाब्द ज्ञान परोक्ष असले तरीही त्याच्या श्रवण-मननांनी संशयभावना, असंभावना आणि विपरीतभावना दूर होऊन तेच अपरोक्ष ज्ञानांत परिणत होते. दिव्य योग या शब्दाचा अर्थ, *'आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिं। ध्याननिर्मथनाभ्यासात् देवं पश्येन्निगूढवत्।।'* (ध्यानबिंदूपनिषत् २२) (आत्म्याची अरणी आणि प्रणवाचा मंथा करून ध्यानरूपी मंथनाच्या अभ्यासाने अंतरांत लपलेला देव (प्रकट करून) पहावा.) ह्या वचनानुसार ध्यानयोग असाही करतां येईल. *'नान्यः पंथा विद्यतेऽयनाय'* (आत्मप्राप्तीसाठी दुसरा मार्ग नाही) (श्वेताश्वतर उ. ३:८, ६:१५) ह्या मंत्रानुसार या अष्टांगयोगाने आणि ज्ञानयोगाने **उद्दधार** *'पादोऽस्य विश्वा भूतानि'* (ऋग्वेद संहिता १०:९०:३) ह्या मंत्रांत प्रतिपादलेल्या मायाप्रपंचरूपी पायाच्या वर त्याच मंत्रांत पुढे सांगितलेल्या *'त्रिपादस्यामृतं दिवि'* तेजोमय, स्वयंप्रकाश अशा अमृतस्वरूप परब्रह्मांत अभेदाने ठेवले. म्हणजेच उपरिनिर्दिष्ट स्वभक्तांना आपल्यासारखेच केले. जरी निरंश अनंत अशा ब्रह्माच्या ठायीं अंशाची कल्पनाही करतां येत नाही तरीही *'निरंशेऽप्यंशमारोप्य कृत्स्नेंऽशे वेति पृच्छतः। तद्भाषयोत्तरं ब्रूते श्रुतिः श्रौतहितैषिणी।।'* (अंशरहित ब्रह्मावर अंशाची कल्पना करून त्याच्याविषयी पूर्ण कीं अंश असे विचारणाऱ्याला, ऐकणाऱ्याच्या हितासाठीच श्रुतिमाउली त्याच्याच भाषेंत उत्तर देते) (पंचदशी २:५८) ह्या वचनानुसार समोरच्याला त्याच्याच भाषेच समजावण्यासाठी तसा शब्दप्रयोग केला आहे. **भूयः** पुन्हां कांही काळाने श्रीपाद श्रीवल्लभ नांवाने **अन्यान्** आणखी भक्तांचाही उद्धार केला. कलियुगांतच **पुनरपि** पुन्हा एकदा नरहरि नांव घेऊन सिद्ध सरस्वती आदि **स्वीयभक्तान्** आपल्या भक्तांचा उद्धार केला. अशा रीतीने भगवंताची कृपाच भक्तांच्या मोक्षाला कारण होते. *'एष एव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो उन्निनीषते एष*

**योऽजोऽक्रियोऽस्पृहोऽप्येको बहुः स्यामिति तृष्णया । प्रकृत्या गुणमय्येदं ततानेशो जगत्प्रभुः ।।४।।**

यः अजः अक्रियः अस्पृहः प्रभुः अपि एकः बहुः स्याम इति तृष्णया गुणमय्या प्रकृत्या जगत् ततान।४।

*एवासाधुकारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो निनीषते।'* (हाच परमात्मा यमलोकांपासून वर काढण्यासाठी सत्कर्माची प्रेरणा देतो आणि हाच यमलोकांत ढकलण्यासाठी दुष्कर्माकडे प्रवृत्त करतो.) (कौषीतकी ब्राह्मण उ. ३:८) ही वेदोक्ति हेच सांगते. ह्यांत परमेश्वराला वैषम्य (पक्षपात) आणि नैर्घृण्य (दुष्टपणा) हे दोष किंवा त्याचे पापपुण्य लागत नाहीत. कारण तो ज्याला त्याला आपापल्या कर्मानुसार फळे देत असतो. कृष्णाकांठी नरसोबावाडी इत्यादि ठिकाणी तसेच भीमातीरी गाणगापूर येथे राहणारा दलादनमुनींच्या वचनानुसार **स्मर्तृगामी** 'स्मरतां दर्शन देणारा' **एषः** हा स्वयंप्रकाश अपरोक्ष **परगुरुः** पर म्हणजे ब्रह्मदेवादिक, त्यांचाही पतंजलींच्या वचनानुसार (*स एव पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्*)(काळाने न भंगणारा तोच प्राचीनांचाही गुरू आहे) (योगसूत्र १:२६) गुरु, **दत्तः** दत्तप्रभू **जयति** स्वभक्तांचा उद्धार हाच जय मिळवीत आहे. ३.

**यः** जो आधीच्या लोकांत वर्णन केला तो **अजः** जन्म, वृद्धी, परिणाम, अस्तित्व, क्षय आणि नाश या सहा विकारांच्या पलीकडला (*'महानज आत्मा'* बृ.उ. ४:४:२४); **अक्रियः** क्रिया म्हणजेच कर्माच्या अतीत असलेला. हे पातंजल योगसूत्रातील क्लेश, कर्म, विपाक, आशय ह्यांचे उपलक्षण आहे. (*'क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः'* योगसूत्र १:२४); **अस्पृहः** वेदांत वर्णिल्याप्रमाणे आप्तकाम (बृ.उ. ४:४:६) असल्याने निरिच्छ; **एकः** ऐतरेय उपनिषदांत (१:१:१) सांगितल्याप्रमाणे (*आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्*) अद्वितीय; अशा ईश्वरापासून जगत् निर्माण होणे असंभव असल्याने वेदवचनांनी मायासहित उपादानाच्या विधानांना (*'मायां तु प्रकृतिं विद्यात्'* श्वे.उ. ४:१०), (*'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते'* ऋ.सं. ६४:७:१८) अनुसरून ईश्वराने मायेचा अंगीकार केला. ह्याचा अर्थ माया ही ईश्वरापासून भिन्न आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. कारण ती ईश्वराचीच शक्ती असून तिला वेगळे वस्तुत्व नाही.

त्यामुळे तिची वेगळी गणना करतां येत नाही. कांही कार्यासाठी मालकाने आपल्या चाकराला दिलेले धन जसे त्याचे होत नाही किंवा पाण्यात पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला शहाणा माणूस दुसरा चंद्र म्हणत नाही त्याप्रमाणे! हेच व्यास महर्षींनी *'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टांतानुपरोधात्'* (१:४:२३) या सूत्राद्वारे प्रतिपादले आहे. हा जो परमेश्वर तो केवळ निमित्तकारणच नसून तोच प्रकृतिरूप उपादानही आहे. वेदांत एका ब्रह्माचे विज्ञान झाले की सर्वांचे विज्ञान होते असे विधान (सर्वविज्ञानप्रतिज्ञा) आहे. (*'येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातम्'*, छां.उ. ६:१:३). त्याला जोडूनच मातीच्या गोळ्याचा दृष्टांत आहे. एका मातीच्या वस्तूचे ज्ञान झाले की सर्व मृन्मय वस्तूंना जाणल्यासारखे आहे. त्या वस्तूंना विविध आकारांनुसार निरनिराळी नांवे दिली तरी त्या सर्वांचे स्वरूप मातीचेच आहे. (*'यथा सोम्येकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद् वाचारंभणं विकारो नामधेयम्'*, छां.उ. ६:१:४) वरील प्रतिज्ञेनुसार आणि दृष्टांताच्या अनुरोधाने प्रकृति ईश्वरापासून अभिन्न आहे असे प्रतिपादन व्यासांनी ह्या सूत्रांत केले आहे. **गुणमय्या प्रकृत्या** अशा ह्या त्रिगुणात्मक प्रकृतीद्वारा **ईश** सर्वज्ञ, स्वतंत्र, भगवान प्रभु, **बहु स्याम्** अनेक रूपें धारण करावीत **तृष्णया** अशा इच्छारूपी संकल्पाने **जगत् ततान** विश्वाचा पसारा मांडला. ईश्वर *'सत्यकाम सत्यसंकल्प'* (छां.उ. ८:१:५) असल्याने त्याचा संकल्प केवळ मनोराज्य नसल्याने प्रत्यक्षात उतरतो. ह्यासाठी ईश्वराला फारसे प्रयास पडले असे नाही. *'स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीप्रमाणे तपोरूपी साधनाची अपेक्षा असली तरी *'बहुः स्याम्'* ह्या संकल्पांत अंतर्भूत असलेले, निर्माण करायच्या जगताचे पर्यालोचन (conception) हेच ते तप होय. कृच्छ्रादि नव्हे. *'यस्य ज्ञानमयं तपः'* (मुं.उ. १:१:३) असे श्रुतिवचनच आहे. **जगत् ततान** असे म्हटले आहे ते घटादिकांप्रमाणे जड नव्हे. तर पुढच्याच लोकांत सांगितल्याप्रमाणे देह, बुद्धी, इंद्रिये यांच्यापासून बनलेले आहे. कुंभाराने घडवलेल्या, घडा, सुरई इत्यादि मातीच्या वस्तूंपासून वेगळे, ज्याचे निमित्त आणि उपादान कारण एकच (ईश्वर) आहे. जीवांच्या कर्मादिकांनुसार देश, काल, नाना रूपे, पूर्वकल्पासारखेच सर्वही प्राणिमात्रांना अनुभवाला येणारे असे हे जगत् आहे. त्याच्या अंतरांत, पाहणारा, ऐकणारा, विचार करणारा, जाणणारा इत्यादि विशेषणांनी युक्त अशा स्वरूपांत *'तत्स्रष्ट्वा*

**आब्रह्मस्तम्बपर्यन्तं देहबुद्धीन्द्रियात्मकम् । सृष्टं चराचरं तत्र संवित्पात्रं नरोत्तमः ।।५।।**

आ+ब्रह्म+स्तंब+पर्यन्तं देह+बुद्धि+इन्द्रिय+आत्मकं चर+अचरं सृष्टम्। तत्र नर+उत्तमः संवित्+पात्रम्।५।

*तदेवानुप्राविशत्'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीनुसार अनुप्रवेश करून त्याचा विस्तार केला. हा अनुप्रवेश घरांत प्रवेशणारा देवदत्त अथवा जलांत प्रतिबिंबित झालेला सूर्य यांसारखा नसून द्रष्टा इत्यादि लक्षणांनी युक्त जीवरूपाने होणारा आहे.४.

ब्रह्मदेवापासून स्थावरांपर्यंत देह, बुद्धी, इंद्रिये धारण करणारे जे चराचर (जीवमात्र) ईश्वराने निर्मिले आहेत त्या सर्वांत श्रेष्ठ मानवच (ईश्वरी) ज्ञानाचा अधिकारी आहे.

*'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे'* ह्या ऋचेनुसार (१०:१२१:१) व *'स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते'* ह्या पुराणवाक्यानुसार (कूर्मपुराण पूर्वभाग ४:३८) ब्रह्मदेव हेच आद्य व श्रेष्ठ शरीरधारी असल्याने त्यांच्यापासून स्थावरांपर्यंत देहबुद्धीन्द्रयात्मक जगताची उत्पत्ति केली. त्या सर्वांत ज्ञानयोग्य असे केवळ मानवशरीरच आहे. ऐतरेय उपनिषदांत सांगितले आहे की ईश्वराने अचेतन लोकांच्या रक्षणासाठी देवांची निर्मिती केली. त्यांच्या प्रार्थनेनुसार भगवंताने गाय इत्यादि पशू (अस्तित्वांत) आणले. त्या सर्वांत 'हा आम्हांला पुरेसा नाही' (*'न वै नोऽयमलम्'*, ऐ.उ. १:२:२) असे म्हणणाऱ्या देवतांना जेव्हां शेवटी विवेकसंपन्न माणूस (अस्तित्वांत) आणला तेव्हां 'हे फार छान केले' (*'सुकृतं बत'*, ऐ.उ. १:२:३) असे त्या म्हणाल्या. ऐतरेय आरण्यकांतही मनुष्याचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. 'मानवांतच आत्म्याचा विकास होतो. तोच प्रज्ञानसंपन्न होतो. ज्ञानाची अभिव्यक्ति करतो, ज्ञान पाहतो, उद्यांची (भविष्याची जाणीव) त्यालाच आहे; इहपरलौकिकांना जाणून मर्त्य असूनही अमृतत्वाची इच्छा करतो. अर्थातच तहान, भूक इत्यादि शारीरिक प्रवृत्ती हीच ज्ञानाची परिसीमा असणाऱ्या इतर पशूंपेक्षा तो संपन्नतम आहे' (ऐ. आरण्यक २:३:२). ज्ञानकर्मांची शक्ती व जिज्ञासा असणारा व त्यांच्या तत्त्वाला जाणू शकणारा पुरुषच साधक, विद्वान् व समर्थ असल्याने त्यालाच ज्ञान व कर्म यांचा

अधिकार आहे.

**विषय -** 'शास्त्रयोनित्वात्' (शास्त्राच्या उगमावरून) ब्रह्मसूत्राप्रमाणे (१:१:३) अद्वितीय आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचा एकमेव उगम असल्याने उपनिषद हा विषय होय.

**अधिकारी -** त्याचा अधिकारी ब्राह्मण होय. कारण तोच विवेकाने 'हे मना! तू का असा पिशाचासारखा सूसाट धावत आहेस? स्वतःसाठी म्हणावे तर तू जड असल्याने प्रयोजन होऊं शकत नाहीस. विषयांसाठी म्हणावे तर ते क्षणभंगुर इत्यादि दोषांनी ग्रस्त असल्याने तुझ्या धांवपळीचे प्रयोजन असूं शकत नाहीत. चैतन्याच्या प्राप्तीची जर तुझी इच्छा असेल तर ते असंग, परमानंदस्वरूप असल्याने ते तुझ्या धांवाधांवीने नाही तर तुझ्या (मनाच्या) नियंत्रणाने, विषयकल्पनांचा त्याग करून 'मी ब्रह्म आहे' ह्या एकाच विषयशून्य वृत्तीने ब्रह्मभावाची अभिव्यक्ती करणाऱ्या महावाक्यांच्या चिंतनांतूनच उगवणाऱ्या बुद्धिवृत्तीद्वाराच जाणतां येईल.'

इथे **नरोत्तम** या शब्दाने बुद्धीने परमार्थप्राप्तीचा निश्चय ज्याने केला आहे असा ब्राह्मण असा घ्यावा. गरुडपुराणांत म्हटले आहेच 'सर्व जीवांमध्ये प्राणी श्रेष्ठ आहेत, त्यांतही बुद्धिजीवी, बुद्धिमानांत माणूस, माणसांतही ब्राह्मण, ब्राह्मणांत विद्वान् आणि विद्वानांत कृतबुद्धी श्रेष्ठ जाणावेत.' ('भूतानां प्राणिनः श्रेष्ठास्तेभ्यो बुद्ध्युपजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणाः स्मृताः। ब्राह्मणेषु च विद्वांसो। विद्वत्सु कृतबुद्धयः।।' गरुड पुराण, प्रेतखंड, धर्मकांड, १२:११).५.

**इन्द्रियार्थे स्थितौ रागद्वेषौ येन जितौ स तु । दैवीसंपल्लभेन्मोक्षं तदर्थं संभवत्यजः ।।६।।**

इन्द्रिय+अर्थे स्थितौ राग+द्वेषौ येन जितौ दैवी+संपत् सः तु मोक्षं लभेत्। तत्+अर्थं अजः संभवति।६।

विषयांच्या ठिकाणी असलेले आकर्षण आणि तिरस्कार जिंकून जो दैवी संपत्ती मिळवतो त्यालाच मोक्षाचा लाभ होतो. त्याच्यासाठीच जन्म-मरणादि विकार नसलेला परमात्मा (या मनुष्यलोकांत) जन्म घेतो. 'स्वयंभू परमात्म्याने इंद्रियरूपी छिद्रे बहिर्मुख छेदली असल्याने (जीव) अंतरात्म्याला न पाहतां बाहेर पाहतो.' (कठ उ. २:१:१), 'ज्याचे श्रवणसुद्धा फार लोकांना लाभत नाही, श्रवण करणाऱ्यांतही बहुतेकांना जो समजत नाही' (कठ उ. १:२:७), 'वस्तऱ्याच्या धारेवर चालणे जसे कठीण तसा हा (परमात्मज्ञानाचा) मार्ग दुर्गम आहे' (कठ उ. १:३:१४) असे जर उपनिषदांतच सांगितले आहे तर त्या ज्ञानाची योग्यता मनुष्याला येते असे कसे म्हणतां येईल? अशी शंका घेतल्यास 'कुणी धीर पुरुष अमृतत्वाच्या इच्छेने आपल्या इंद्रियांचा संयम करून प्रत्यगात्म्याचे दर्शन घेतो' (कठ उ. २:१:१), 'शहाण्याने वाचेचा मनांत संयम करावा आणि त्याचा (मनाचा) निग्रह आत्मज्ञानासाठी करावा' (कठ उ. १:३:१३), 'जो केवळ आत्म्यालाच वाहून घेतो त्यालाच हा आत्मा आपल्या स्वरूपाची ओळख करून देतो' (कठ उ. १:२:२३) इत्यादि श्रुतींच्या प्रतिपादनावरून ही शंका निराधार आहे हे स्पष्ट करण्यासाठी ह्या श्लोकांत म्हणतात. सर्वच इंद्रियांच्या विषयांच्या ठिकाणी 'सुखाशी संलग्न असणारा राग' व 'दुःखाशी निगडित असणारा द्वेष' या पातंजल (२:७) उक्तीनुसार पूर्वजन्मातील संस्कारांनी घडलेल्या जीवाच्या प्रकृतींतील अनुकूल व प्रतिकूल प्रवृत्ती **येन** ज्याने भगवंताच्या ध्यानादिकांनी **जितौ** जिंकल्या आहेत **स तु** त्या रागद्वेषरहित साधकाला **दैवीसंपत्** दैवी संपदा प्राप्त होते व त्याचे अज्ञानकल्पित स्थूल देहापासून अहंकारापर्यंतचे सर्व बंध तुटून **मोक्षं लभेत्** मोक्ष मिळतो. श्रीमद्भगवद्गीतेतील *'इन्द्रियस्येन्द्रियार्थे..'* (३:३४) व 'दैवी संपद्विमोक्षाय' (१६:५) ह्या श्लोकांत हेच सांगितले आहे. गीतेच्या १६व्या अध्यायांत दैवी संपदेचे निरूपण आहे. **तदर्थं** त्या मोक्षाला योग्य अशा आपल्या भक्तासाठीच **अजः** अजन्मासुद्धा भगवंत **अवतरति** भूतलावर अवतरतो.६.

**गाढं प्रियोऽस्य भगवांस्तस्यायमपि तादृशः । गुप्त्या अवतरत्यस्य लीलाधाम्नाप्यजोऽव्ययः ।।७।।**
**युगे युगेऽवतीर्यापि कार्यान्ते व्यसृजत्तनूः । एवं ब्राह्मेऽह्नि संप्राप्तो युगाष्टाविंशपर्ययः ।।८।।**

अस्य भगवान् गाढं प्रियः, अयं अपि तादृशः। अस्य गुप्त्या अजः अव्ययः लीला+धाम्ना अवतरति।७। युगे युगे अवतीर्य अपि कार्य+अन्ते तनूः व्यसृजत्। एवं ब्राह्मे अह्नि युग+अष्ट+विंश+पर्ययः संप्राप्तः।८।

गीतावचनानुसार (७:१७) ह्या(भक्ता)चे भगवंतावर प्रगाढ प्रेम असते तसेच त्या(भगवंता)चेही तसेच ह्याच्यावर प्रेम असते. ह्याच्या रक्षणासाठीच जन्म-मृत्युरहित परमात्मा लीलादेहाने अवतार घेतो.७.

युगायुगांत अवतरून कार्याच्या शेवटी त्या त्या देहांचे विसर्जन करतो. अशा रीतीने ब्रह्मदेवाच्या २८व्या चतुर्युगीत सांप्रत दिवशीं वर्तमान वाराह कल्पांत, ('सध्याच्या वैवस्वत मन्वंतरांत' अध्याहृत आहे.).८. ह्या घोर कलियुगांत आपल्या अंशापासून झालेल्या देवतांची दयाशून्यता लक्षांत घेऊन खुद्द दत्त भगवंतांनीच अवतार घेतला.

**घोर कलियुग.** अधर्माच्या प्राबल्यामुळे कली घोर झाला आहे. ह्या कलीत *'मानव सगळे धर्मभ्रष्ट व लिंगजिह्वापरायण (असतील); ब्रह्मचारी व्रतहीन, संन्यासी कुटुंबवत्सल,।।१।। स्त्रिया कामासक्त तर गृहस्थ आचारहीन (असतील). ते देहाने छोटे, खूप खाणारे, मंदभागी, निर्लज्ज,।।२।। स्त्रीलंपट, विपुल संतति असलेले, मूर्ख आणि आपल्या नातेवाइकांना आणि मित्रांना सोडणारे,।।३।। स्त्रिया पतीची अवज्ञा करणाऱ्या, तर पुत्र पित्याचा द्रोह करणारे; नोकर धन्याला टाकणारे तर शिष्य पूर्णपणे गुरूला ठकविणारे!।।४।। म्लेच्छप्राय राज्यकर्ते प्रजेचे आर्थिक दृष्ट्या भक्षण करतील, ब्राह्मण कवडीसाठीही वेदांचा विक्रय करणारे, दुष्ट,।।५।। प्रतिग्रह आणि परस्त्री यांच्या मागे लागल्याने सिद्धिविवर्जित असतील. उच्चवर्णीय लोक हीन व्यवसाय करतील तर हीन लोक श्रेष्ठांचे।।६।। यज्ञयाग बंद झाल्याने वृष्टी आणि अन्न कुठेकुठेच उपलब्ध होईल (दुष्काळसदृश स्थिती).*

**दारुणेऽस्मिन्कलौ प्राप्ते ज्ञात्वा स्वांशांशजोतयः। दयोना इत्याविरासीद्दत्तस्तु भगवान्स्वयम् ।।९।।**

अस्मिन् दारुणे कलौ प्राप्ते स्व+अंश+अंश+ज+ऊतयः दया+ऊना इति ज्ञात्वा स्वयं भगवान् दत्तः तु आविरासीत्।९।

*पुरुष १६व्या वर्षी म्हातारे होतील (केस पांढरे) तर १० वर्षाच्या मुली माता होतील.।।७।। राज्यकर्तेच चोर, धर्मांत पाखण्डच अधिक, सर्व वर्ण शूद्रप्राय आणि मेंढीएवढ्या गाई।।८।। घरासारखे (भोगसाधनांनी समृद्ध) मठादिक तर घरे ओसाड होतील. वनस्पती अणूंप्रमाणे सूक्ष्म तर वृक्ष शमीप्रमाणे लहान।।९।। ढग नुसते विजेसारखे चमकतील (वर्षणार नाहीत); असे सर्व कलियुगांत घडणार आहे.* (दत्तपुराण ८:८:२३-३२) अशा ह्या दारुण कलीच्या काळांत **स्वांशांशजोतयः** स्वांश म्हणजे आपला अंश ब्रह्मदेव, त्याचे अंश मरीचि, कश्यपादि मानसपुत्र, त्यांपासून जन्मलेले इन्द्र, मरुद्गण, वसु, आदित्य इत्यादि **ऊतयः** विभूति म्हणजे देवता माणसाच्या पापामुळे त्यांच्याविषयी तिरस्काराने **दयोना** निर्दय झाल्या **इति** असे जाणून **स्वयं भगवान् दत्तस्तु आविरासीत्** स्वतः भगवान् दत्तांनी अवतार घेतला. ज्याप्रमाणे नोकरचाकरांवर कार्य सोपवलेले असले तरी ते सर्व दमून भागून गेल्यावर एखादे तांतडीचे कार्य उपस्थित झाले असतां स्वतः मालकच काम करूं लागतो आणि त्याला पाहून थकलेले असले तरी ते नोकर आपसुकच कामाला लागतात त्याप्रमाणे. असे न मानल्यास देव विषम (म्हणजे पक्षपाती) आहे असे वाटेल.९.

**स कृष्णामरजातीर-विहारी लोकपावनीः । भिक्ष्वात्मनात्र सल्लीलाः कृत्वाऽदृश्योऽस्ति तत्र हि ॥१०॥**
**ॐकारोच्चारणं जातमात्रेण नयनं तथा । स्वर्णतामयसोऽभ्यासमृतेऽपि ब्रह्मपाठनम् ॥११॥**
**तत्त्वोपदेशनं पित्रोर्बाल्ये तीर्थाटनं तथा । योगाख्यापनसंन्यास-वर्त्मसंस्थापनेऽन्यथा ॥१२॥**

सः कृष्णा+अमरजा+तीर+विहारी भिक्षु+आत्मनः लोक+पावनीः सत्+लीलाः कृत्वा तत्र अदृश्यः अस्ति हि।१०। जातमात्रेण ॐकार+उच्चारणं, तथा अयसः स्वर्णतां नयनं, अभ्यासं ऋते अपि ब्रह्म+पाठनम्।११। पित्रोः तत्त्व+उपदेशनं, तीर्थ+अटनं तथा योग+आख्यापनं+संन्यास+वर्त्म+संस्थापने अन्यथा..।१२।

तो कृष्णा आणि अमरजा यांच्या तीरांवर विहरणारा, संन्यासी रूपानें, लोकांना पावन करणारा मंगल लीला करून तिथे अदृश्य रूपांत आहेच. **स** तो अवतरलेला प्रभु. भिक्षु = संन्यासी. नास्तिकांना अदृश्य असला तरी भक्तांना (तसा) नाही. (म्हणजे भक्तांना आजही दर्शन देतो.) **हि** प्रसिद्ध ह्या अर्थाने.१०. (इथून पुढे आठ श्लोकांत ह्या अवताराचे भगवत्स्वरूप अघटितघटनापटुत्वाद्वारे प्रदर्शिले आहे. यालाच अष्टश्लोकी गुरुचरित्र असेही म्हणतात.) जन्मताच ॐकाराचा उच्चार, लोखंडाचे सोने करणे, अभ्यासाविनाही वेदांचे पठण; **जातमात्रस्य** साधारण नवजात बालकाला श्वास घेण्यालाही प्रयत्नांची आवयकता असते. त्या वेळीच लोकांत प्रसिद्ध असलेले **ॐकारोच्चारणं** ह्याचे ॐकाराचे उच्चारण ह्याच्या ईश्वरत्वाचे गमक आहे. **अयसः स्वर्णतां नयनं** कांही रासायनिक प्रक्रियांनी नव्हे तर केवळ हाताच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने करणे, **अभ्यासमृते** गुरूंजवळ जाऊन अभ्यास न करतांच एकदम **ब्रह्मणो** वेदांचा **पाठनम्** पाठ करणे,११. **पित्रोः** आई-वडिलांना **तत्त्वोपदेशनं** तत्त्वज्ञानाचा उपदेश, **बाल्ये** वयाच्या आठव्या वर्षीच तीर्थयात्रेला जाऊन **योगाख्यापन** योगाचा उपदश करणे तसेच संन्यामार्गाची प्रतिष्ठापना करणे, अन्यथा (पुढील श्लोकांत वाक्य पूर्ण होते).१२.

**कथं भाव्यं द्राग्घरणं प्रतीपाचरणै रुजः । तथाऽवाचोऽपि विद्वत्ता-दानं साग्विप्रदुर्गतेः ।।१३।।**
**हरणं त्रिस्थलीयात्रा-चरणं मृतजीवनम् । वशागोदोहनं विश्व-रूपाविष्करणं यतौ ।।१४।।**
**विद्वद्गर्वापहरणं निन्द्यास्याद्वेदवाचनम्। विश्वस्ताया अवैधव्य-दानं कर्मप्रकाशनम् ।।१५।।**
**जरदेधःपल्लवतां नयनं निष्कलस्त्रियै । सुप्रजस्त्वार्पणं कुष्ठ-हरणं दृष्टिमात्रतः ।।१६।।**

(अन्यथा) कथं भाव्यम्? प्रतीप+आचरणैः रुजः द्राक् हरणं तथा अवाचः अपि विद्वत्ता+दानं, विप्र+दुर्गतेः साग् (हरणं),।१३। हरणंत्रि+स्थली+यात्रा+चरणं, मृत+जीवनं, वशा+गो+दोहनं, यतौ विश्व+रूप+आविष्करणं।१४। विद्वत्+गर्व+अपहरणं, निन्द्य+आस्यात् वेद+वाचनं, विश्वस्ताया अवैधव्य+दानं, कर्मप्रकाशनम्।१५। जरत्+एधः पल्लवतां नयनं, निष्कल+स्त्रियै सु+प्रजस्त्व+अर्पणं, दृष्टिमात्रतः कुष्ठ+हरणम्।१६।

**अन्यथा कथं भाव्यं** श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींच्या साक्षात् ईश्वरस्वरूपाशिवाय दुसऱ्या कोणत्या उपपत्तीने ह्या सर्व चमत्कारांचा उलगडा होऊं शकतो? हे पुढे वर्णिलेल्या सर्व चमत्कारांना लागूं होते.१३. प्रतिकूल आचरणानेच (कुपथ्य करूनच) तात्काळ रोग घालविणे. तसेच जीभ नसलेल्या (ब्राह्मणाला) विद्वत्तेचे दान करणे, विप्राची दुरवस्था (दारिद्र) लगेच घालविणे, निमिषमात्रांत गंगानुजाला त्रिस्थळीची यात्रा घडविणे, ब्राह्मणाच्या मरण पावलेल्या मुलाला जिवंत करणे, वांझ म्हशीचे दोहन करणे; **वशागो** इथे म्हशीला अनुलक्षून आहे; किंवा *वशा अगो* अशी फोड करून गाईव्यतिरिक्त ती म्हैस असाही अर्थ करतां येईल. (त्रिविक्रम भारती) यतीला विश्वरूप दाखविणे,१४. विद्वान् ब्राह्मणांचा गर्व उतरविणे, पतिताच्या मुखाने वेदपठण, आपल्यावर विश्वासलेल्या विधवेला (तिचा मृत पती जिवंत करून) सौभाग्यदान, कर्मकांडाचे प्रकाशन,१५. जीर्ण (औदुंबर) काष्ठाला पालवी आणणे, ऋतुहीन (वृद्ध व वांझ) स्त्रीला उत्तम संतती प्राप्त करून देणे, केवळ दृष्टिक्षेपाने (नंदीचे) कुष्ठ घालविणे,१६.

**क्षणेऽष्टग्रामगमनं छिन्नसस्यविवर्धनम् । इत्यादिकं कृतं दिव्यं करोति च करिष्यति ।।१७।।**
**भपार्थिवरजोऽम्ब्वंश-गणकाः सन्तु कुत्रचित् । भूयोऽगणेयोरुगुण-गुणान्गुणयितुं ह्यलम् ।।१८।।**
**लीलाप्रादुष्कृतगुण-रूपोऽरूपोऽगुणोप्यरम् । श्रवःसृत्या प्रविश्यांतर्भक्तस्याघं धुनोत्यजः ।।१९।।**

क्षणे अष्ट+ग्राम+गमनं, छिन्न+सस्य+विवर्धनम्। इत्यादिकं दिव्यं कृतं, करोति च करिष्यति।१७। भ+पार्थिव+रज+अम्बु+अंश+गणकाः कुत्रचित् सन्तु। भूयः अगणेय उरु+गण+गुणान् गु(ग)णयितुं हि अलम्।१८। अरूपः अगुणः अजः अपि लीला+प्रादुष्कृत+गुण+रूपः श्रवः+सृत्या अंतः प्रविश्य भक्तस्य अघं धुनोति।१९।

(दिवाळीच्या) उत्सवांत (एकाच वेळी) आठ गांवीं जाणे, (अकाळी) कापलेल्या पिकाचे संवर्धन इत्यादि (चमत्कार त्या श्रीगुरूंनी) (पूर्वी) केले, (आजही) करतात व (पुढेही) करणार आहेत. आठ प्रिय भक्तांच्या प्रार्थनेनुसार आठही गांवीं जाऊन त्यांच्यासह दिवाळी साजरी केल्याची कथा पुढे येणार आहे.१७. आकाशांतील तारे, भूमीवरील धुळीचे कण किंवा (समुद्राच्या वा पावसाच्या) पाण्याचे थेंबही मोजणारे कुठे (कुणी कदाचित्) सांपडतील पण अनंतगुणसंपन्न परमेश्वराचे गुण मोजणे (कधीच संपणार नसल्याने) पुरे झाले. इथे *'विष्णोर्नु कं वीर्या..'* (ऋग्वेद सं. १:१५४:१) ह्या वेदवाक्याचा आशयच सुचविलेला आहे. *'वेवेष्टीति विष्णुः'* म्हणजेच सर्वव्यापी भगवंत त्याचे *'वीर्याणि'* पराक्रम (लीला) *'कः प्रवोचत'* कोण वर्णू शकेल? 'नु' खरोखर कुणीच नाही. *'यः पार्थिवानि रजाँसि विममे'* जो पृथ्वीवरील धूळीचे कण(ही कदाचित्) मोजील तोसुद्धां नाही. *'यो विष्णुः त्रेधा विचक्रमाणः'* तीन पावलांनी *'सधस्थं'* तेथील निवासी देवांसह *'उत्तरं लोकं'* पलीकडच्या सत्यलोकाला *'अस्कभायद्'* भिडून *'स्थः'* स्थिरावला आहे. निर्गुण आणि निराकार असूनही केवळ लीलेनेच धारण केलेल्या गुणांच्या रूपाने हा अजन्मा श्रवणेंद्रियांच्या द्वारे भक्तांच्या अंतरांत प्रवेश करून (त्यांची) पापे नष्ट करतो.१९.

**तदेकनिष्ठः पूतात्मा जीवन्मुक्तो भवेत्ततः । निर्द्वन्द्वस्यारब्धभुजो देहः पततु वा न वा ।।२०।।**
(क्षेपकः) **तत्राज्ञानसमुत्पन्न-द्वंद्वाभावः प्रवर्तते । प्रारब्धान्ते स यात्येव कैवल्यं पदमुत्तमम् ।।**
**अयं हि ब्रह्मभूयाप्ति-सत्पथो नाक्षिगोचरः । मोहान्धानामसत्संग-विवेकानां कुसंपदाम् ।।२१।।**

ततः तत्+एक+निष्ठः पूत+आत्मा जीवन्+मुक्तः भवेत्। निर्द्वन्द्वस्य आरब्ध+भुजः देहः पततु वा न वा।२०। तत्र अज्ञान+समुत्पन्नः +द्वंद्व+अभावः प्रवर्तते। सः प्रारब्ध+अन्ते उत्तमं कैवल्यं पदं याति एव।(क्षेपकः।) अयं ब्रह्म+भूय+आप्ति+सत्+पथः अ+सत्+सङ्ग+विवेकानां मोह+अन्धानां कु+संपदां न हि अक्षि+गोचरः।२१।

मग तो एकनिष्ठ भक्त शुद्धचित्त होऊन जिवंतपणीच मुक्त होतो. सुखदुःखादि द्वंद्वांपलीकडे जाऊन प्रारब्धाचा भोग घेतो; मग त्याचा देह पडो वा न पडो. **ततः** पापक्षालन झाल्यावर **तदेकनिष्ठः** भगवत्परायण असल्याने **पूतात्मा** शुद्ध म्हणजेच रागद्वेषादि विकाररहित अंतःकरण झाल्याने अपरोक्ष अनुभूति प्राप्त करून घेऊन **जीवन्मुक्तो भवेत्** जिवंतपणीच मुक्त होतो. **निर्द्वंद्वस्य** भगवद्गीतेत *‘दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः। वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते’* (२:५६) असे वर्णन केल्याप्रमाणे स्थितप्रज्ञ होऊन **आरब्धभुजः** प्रारब्ध भोग भोगत राहतो. मग **देहः** पडो वा न पडो.२०. तिथे अज्ञानजन्य द्वंद्वाचा अभावच असतो. (असा हा जीवन्मुक्त) प्रारब्ध (भोगून) संपल्यावर श्रेष्ठ असे मोक्षपद पावतो (विदेहमुक्त होतो.) (क्षेपक). मात्र हा ब्रह्मपदप्राप्तीचा सन्मार्ग संतसंगति आणि विवेक यांच्या अभावीं मोहांध झालेल्या, आसुरी संपदेचा आश्रय केलेल्यांच्या डोळ्यांना दिसत नाही.

गरुडपुराणांत सांगितल्याप्रमाणे, ‘सत्सङ्गश्च विवेकश्च निर्मलं लोचनद्वयम्। यस्य नाऽस्ति नरः सोऽन्धः कथं न स्यादमार्गगः।।’ सत्संग आणि विवेक हे दोन स्वच्छ नेत्र ज्याला नाहीत तो मानव आंधळाच होय. (मग) तो आडवाटेला लागणार नाही का? नाकापासून कानापर्यंत पसरलेले दोन डोळे असलेल्यांना डोळस मानले तरी सूक्ष्म कार्याची पाहणी सत्संग आणि विवेक ह्याच नेत्रद्वयांनी होते. त्यांचा अभाव असणारा आंधळाच होय. म्हणून तो आडवाटेला - म्हणजे दुराचरणाने पशु आदि योनींच्या गतीला जातो (विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे। वासुदेव निर्मल देहे जेणे त्वत्पदिं राहे।।).२१.

**कृतस्ववर्णाश्रमदृष्टकर्मा विद्वान् सदिष्टो गुरुदेवभक्तः ।**
**इहैव भुक्तिं च लभेत मुक्तिं संन्यास्यनेनैव पथा स योगी ।।२२।।**

कृत+स्व+वर्ण+आश्रम+दृष्ट+कर्मा सत्+इष्टः गुरु+देव+भक्तः विद्+वान् सः योगी संन्यासी (च भूत्वा) अनेन एव पथा इह एव भुक्तिं मुक्तिं च लभेत।२२।

आपल्या वर्णाला आणि आश्रमाला उचित असे कर्म केल्याने तो संतांचा लाडका होतो. त्याच कारणाने तो सद्‌गुरू आणि ईश्वर यांचा उपासक होतो. याच मार्गाने तो गीतेच्या वचनानुसार *('अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः। स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः' ।।६:१।।)* विद्वान् म्हणजे ज्ञानी होतो. विहित कर्माचे निष्काम अनुष्ठान केल्याने विविदिषा उत्पन्न होते आणि ईश्वराभिन्न सद्‌गुरूंची भक्ती हीच उपासना केल्याने चित्ताला एकाग्रता येते. तिच्या योगाने वेदांत निर्देशिलेली शमदमादि (*'शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति।'* सुबालोपनिषत् ९:१४) आत्मविद्येची अंतरंग साधने सिद्ध होतात. अशा रीतीने आत्मज्ञानाचा मुख्य अधिकारी झाल्यावर सद्‌गुरूंना शरण जाऊन श्रवणादींनी **विद्वान् सन्** ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुक्तीचा लाभ करून घेतो. तसेच तैत्तिरीय उपनिषदांत (आनंदवल्ली) वर्णन केलेल्या सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंतच्या एकाहून एक शंभरपट आनंदांचा भोगही घेतो. मोक्षाच्या ठायीं कामादिविषयांचा भोग वस्तुतः नसतो. तथापि विषयांनंदांचा समावेश ब्रह्मानंदांत अंशत्वाने असल्याने ब्रह्मानंदाची प्राप्ती झाली की सर्व विषयांचा भोग घेतल्यासारखाच होतो. वेदांतसूत्रांत (*'ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्।'* ३:४:५१) सांगितल्याप्रमाणे (प्रारब्धाचा) प्रतिबंध नसेल तर ह्याच जन्मांत तो मुक्त होतो. अन्यथा प्रतिबंध असेल तर तो जन्मातराने मुक्त होतो.२२.

**एवं सुवृत्तं महिमानमीशितुः श्रुत्वास्य भीमामरजागमे ययौ ।**
**कश्चिद्भवभ्रष्टमनाः स्तुवन्गुरुं तप्तः शरण्यं श्रितकल्पशाखिनम् ।।२३।।**
**गणेशं शारदां नत्वा श्रीगुरुं नामधारकः। द्विजस्तुष्टाव घोरेऽत्र नृधाम्ना विश्रुतं हरिम् ।।२४।।**

एवं अस्य ईशितुः सुवृत्तं महिमानं श्रुत्वा कश्चित् तप्तः भव+भ्रष्ट+मनाः श्रित+कल्प+शाखिनं शरण्यं गुरुं स्तुवन् भीमा+अमरजा+गमे ययौ।२३। नामधारकः द्विजः गणेशं शारदां श्रीगुरुं नत्वा अत्र घोरे नृ+धाम्ना विश्रुतं हरिं तुष्टाव।२४।

ह्या पहिल्या २२ लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी द्विसाहस्री या आपल्या गुरुचरित्राच्या अनुवादात्मक ग्रंथाचा उपोद्घात केला आहे. मंगलाचरण, चरित्रनायक, ग्रंथाचा विषय, अधिकारी, सूत्ररूप चरित्र, भगवद्गुणांच्या श्रवणकीर्तनाचे माहात्म्य इत्यादि विषय यांत आले आहेत. आतां पुढील लोकापासून मूळ श्रीगुरुचरित्राचा उपोद्घात उर्वरित अध्यायांत अनुवादला आहे.  असे हे भगवान दत्तात्रेयांचे शुभ वर्तमान व माहात्म्य ऐकून (आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक अशा त्रिविध तापांनी) पोळलेला आणि त्यामुळेच संसाराला विटलेला विरक्त असा कोणी एक ब्राह्मण श्रीगुरूंची स्तुती करीत भीमामरजा संगमावर लीलेने निवास करणाऱ्या, लोकांना मात्र पादुकारूपानेच दिसणाऱ्या, स्वभक्तांचा कल्पवृक्ष आणि म्हणूनच शरण जाण्याला योग्य अशा भगवंताकडे गेला.२३. त्या नामधारक नांवाच्या ब्राह्मणाने श्रीगणेश आणि शारदा यांना वंदन करून या घोर कलियुगांत मनुष्यरूपाने (अवतरलेल्या) सुप्रसिद्ध दैन्य, दुःख, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. सरस्वतीपंत ह्या नांवाने प्रसिद्ध आणि श्रीगंगाधरांचा पुत्र असणाऱ्या त्या ब्राह्मणाने आपल्या अभिमानाच्या परिहारासाठी नामधारक हे कल्पित नांव घेतले. ऐतरेय आरण्यकांत (*'तस्य वाक्तन्तिर्नामानि दामानि तस्येदं वाचातन्त्या नामभिर्दामभिः सर्वं सितम्।'* २:१:६) म्हटल्याप्रमाणे नाम हे दाम म्हणजे बंधन आहे. श्रीदत्तप्रभूंच्या साक्षात् दर्शनाच्या इच्छेने त्यांना स्तुतीने प्रसन्न करण्यासाठी, प्रथम निर्विघ्नसिद्धीसाठी गणेशादींना वंदन करून ह्या घोर कलियुगांत नरहरि नांव धारण केलेल्या दत्तात्रेयांचे स्तवन करूं लागला.२४.

**सर्वज्ञ मां न जानीषे विश्वसाक्षिन्न चेक्षसे । विलापो न श्रुतो विष्णो मम श्रुत्वाप्युपेक्षसे ।।२५।।**
**चेज्ज्ञातेऽत्र क्व वैक्लव्यं कथं दैन्यं त्वयेक्षिते । श्रुते चेच्छुक्कुतोऽप्यर्हा त्वय्युपेक्षा दयानिधे ।।२६।।**
**सर्वदेवेश्वरोऽपि त्वं त्वं नोऽपि कुलदैवतम् । त्वां हित्वा कतमं याचे वेद्मीशन्त्वापि वेत्सि माम् ।।२७।।**

(हे) सर्वज्ञ (अपि) मां न जानीषे? (हे) विश्व+साक्षिन् न च ईक्षसे? (हे) विष्णो मम विलापः न श्रुतः? श्रुत्वा अपि उपक्षसे (किम्)।२५। चेत् ज्ञाते अत्र क्व वैक्लव्यम्? त्वया ईक्षिते कथं दैन्यम्? श्रुते चेत् कुतः शुक्? (हे) दया+निधे त्वयि उपेक्षा अर्हा अपि?।२६। त्वं सर्व+देव+ईश्वरः अपि, त्वं नः कुल+दैवतं अपि। (हे) ईश, त्वां हित्वा कतमं याचे? त्वां वेद्मि (त्वं) अपि मां वेत्सि।२७।

हे सर्वज्ञा, तूं मला ओळखत नाहीस (का?) हे विश्वसाक्षी देवा, तू मला पाहत नाहीस (का?) हे व्यापनशीला माझा शोक तू ऐकत नाहीस (का?) कीं तू ऐकूनसुद्धा उपेक्षा करतो आहेस? मुण्डकोपनिषदानुसार (*'यः सर्वज्ञः सर्ववित्।'* १:१:९) हे सर्वज्ञा, मला ओळखत नाहीस का? इथे **अपि** प्रश्नार्थक आहे. (अमरकोश ३:३:२४९). विशेषणांची योजना हेतुगर्भ आहे. सर्वज्ञ असूनही मला कसा जाणत नाहीस? विश्वसाक्षी असून मीच कसा दिसत नाही? सर्वव्यापी असूनही माझा विलाप ऐकत नाहीस? असा भावार्थ.२५. देवाला उद्देशून योजलेली सर्वही संबोधने अन्वर्थक असूनही विपरीत अनुभव का येतो आहे हे या श्लोकांत विचारले आहे. जर तू मला ओळखतोस तर मग मी असा विह्वळ का? जर तू (माझ्याकडे) पाहत असशील तर माझे दैन्य कसे आहे? (माझा विलाप) तुझ्या कानांवर पडूनही (माझा) शोक (अजूनही) कसा राहिला? हे दयासागरा, तुला ही उपेक्षा शोभते का? अर्थात् मुळीच नाही!२६. 'अरे कार्याला उशीर लागतो. उशीर सहन होत नसेल तर आणखी कुठल्या तरी देवाकडे जा.' असे म्हणाल तर आपल्यासारखा दुसरा (समर्थ) कोणी नाही हे सांगतात. आपणच सर्व देवांचे अधिदेव आहां. आमचे कुलदैवत आहां. आपल्याला सोडून कुणाकडे (कोणत्या इतर देवाकडे) याचना करूं? 'कशावरून?' म्हणाल तर मी आपल्याला सर्व देवांचा देव म्हणून शब्दप्रमाणाने जाणतो. कारण आपणच गीतेत *'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः'* (१५:१५) असे सांगितले आहे. आपण तर मला भक्ताला प्रत्यक्षच जाणतां.२७.

**सर्वोऽपि वेत्ति भूपं न भूपः सर्वन्तथोचितम् । अज्ञे तु त्वयि सर्वज्ञे कथं श्लाघ्यमिदं प्रभो ।।२८।।**
**नासेवकायादात्रेऽपि चेद्दास्यस्युचितं न तत् । सेवेच्छुः श्रीश किं दाता तद्वत्प्रत्युपकार्यपि ।।२९।।**
**ज्योतिर्द्योतमिहाब्दोम्बु सेवोनेऽर्पयति ध्रुवे । पदं बिभीषणेऽदात्रोर्दत्तं मे देह्यतः प्रियम् ।।३०।।**

सर्वाः अपि भूपं वेत्ति, न भूपः सर्वम्। तथा तु अज्ञे(भूपे) उचितम्। (हे) प्रभो त्वयि सर्वज्ञे इदं कथं श्लाघ्यम्?।२८। असेवकाय अदात्रे अपि न दास्यसि इति चेत् न तत् उचितम्। (हे) श्री+ईश, सेवा+इच्छुः तत् वत् प्रति+उपकारी अपि दाता किम्?।२९। इह ज्योतिः द्योतं, अब्दः अम्बु, सेवा+ऊने अर्पयति। अदात्रोः ध्रुवे, बिभीषणे (च) पदं दत्तम्। अतः मम प्रियं देहि।३०।

'राजाला सगळे ओळखतात पण राजा सर्वांना (विशेषतः) ओळखत नाही; तसेच हे आहे' असे आपण म्हणाल तर अल्पज्ञ राजाच्या बाबतीत हे कदाचित् योग्य ठरेल पण आपण तर सर्वज्ञ आहांत. आपल्याला हे कसे शोभेल?२८. ते असो! सेवा न करणाऱ्याला व (कांही) न देणाऱ्याला आपण देत नाही असे म्हणणेही आपल्याला योग्य नाही. आपण श्री म्हणजे अव्याहत ऐश्वर्याचे धनी आहांत. या विशेषणाने दान देण्याची क्षमता आणि औदार्य आपल्या ठिकाणी आहे हे सुचविले आहे. सेवेची अपेक्षा करणाऱ्याला दाता म्हणतां येईल का? किंवा सेवेच्या अपेक्षेने दान करणारा *किंदाता* निकृष्ट दाता ठरेल. तेच प्रत्युपकारकर्त्याविषयीही म्हणता येईल. सीतेच्या शोधानंतर हनुमंताला श्रीरामप्रभु म्हणतात 'हे वानरश्रेष्ठ! तुझा हा उपकार माझ्यांतच जिरून जावो. प्रत्युपकाराची अपेक्षा करणारा माणूस उपकारकर्त्यावर विपत्ति येण्याची इच्छा करतो.' (*'मय्येव जीर्णतां यातु उपकारो हरे तव। नरः प्रत्युपकारार्थी विपत्तिमभिवाञ्छति।।'* उत्तरकांड ४०:२४).२९. 'तरी अशा प्रकारचे दान कुठे पाहिलंस का?' असा प्रश्न अपेक्षून म्हणतात. इथे (इहलोकी) सूर्यचंद्राग्निरूप ज्योति प्रकाशाचे, तसेच मेघ पाण्याचे दान, सेवा न करणाऱ्याही सर्व लोकांना देतात. आपल्याला कांहींच न दिलेल्या ध्रुव आणि बिभीषण या दोघांना अढळपद आणि राज्य आपणच दिले आहे. तरी मला माझे प्रिय असे तुझे दर्शन दे.३०.

**निधयस्तेऽनुगा दास्यः सिद्धयः श्रीस्तु किङ्करी । तत्ते किं भगवन्देयं किं कार्यं परिपूर्ण ते ।।३१।।**
**स्वसेवककुलं भूमौ पालयन्ति नृपा अपि । कुतो मोपेक्षसे दीनं मत्पूर्वार्चित विश्वभृत् ।।३२।।**
**देवेश मेऽपराधैश्चेदायास्यन्तर्विषादताम् । पत्ताडितार्भकैः किं नु प्रसू रुष्यति मानुषी ।।३३।।**

(हे) भगवन्, निधयः ते अनुगाः, सिद्धयः दास्यः, श्रीः तु किङ्करी। तत् (हे) परिपूर्ण ते किं देयम्? ते किं कार्यम्?।३१। भूमौ नृपाः अपि स्व+सेवक+कुलं पालयन्ति। (हे) विश्व+भृत्, मत्+पूर्व+अर्चित कुतः मां दीनं उपेक्षसे?।३२। (हे) देव+ईश, चेत् मे अपराधैः विषादतां आयास्यन्तः, मानुषी (अपि) प्रसू पत्+ताडित+अर्भकैः रुष्यति किम्?।३३।

'त्या वेळी दिले. आतां थोडे घेऊन देतो' असे म्हणाल तर निधि आपले अनुचर आहेत, सिद्धी आपल्या दासी आहेत, साक्षात् लक्ष्मी आपल्या चरणाची सेवा करते, आपल्याला काय देतां येईल? अर्थात् कांहीच नाही. किंवा आपण नित्यच परिपूर्ण असल्याने आपले कांही कार्यही करतां येणार नाही.३१. याउप्परही आपण अपेक्षा करीत असाल तर असे पहा, ह्या भूलोकांत मनुष्यांतील राजेसुद्धा आपल्या नोकरांच्या वंशजांचे पालन करतात ना? माझ्या वाडवडिलांनी पूजलेल्या देवा, मज दीनाची का उपेक्षा करतोस? इथे मी जरी सेवा केली नसली तरी माझ्या पूर्वजांच्या सेवेचा विचार करून माझी उपेक्षा करूं नका असे सुचविले आहे. **विश्वभृत्** विश्वाच्या पोशिंद्या, असे संबोधन योजून माझा विश्वांतच अंतर्भाव असल्याने माझ्या भरणपोषणाची जबाबदारी आपलीच आहे असे म्हणायचे आहे. नाही तर मला विश्वाच्या बाहेर करावे लागेल असा भाव आहे.३२. किंवा हे देवाधिदेवा, माझ्या अपराधांनी आपल्याला राग आला असे म्हणावे तर गर्भांत किंवा मांडीवर असलेल्या लेंकराने लाथा मारल्या तरी मानवी माता रागावते का? मुळीच नाही! मग देवांचेही देव असलेल्या आपल्याला असा रोष शोभत नाही.३३.

**जीवनं पितरौ यत्र भिन्नावन्यतराच्छिशोः । त्वं तूभयं मे किं कार्यं निर्घृणे विश्वभृत्त्वयि ।।३४।।**
**साहसं कुरु मेत्युक्त्वा यथा दारु भिनत्ति विः । तथा साहजिकैर्दोषैर्निन्दाम्यंहः करोम्यहम् ।।३५।।**

यत्र पितरौ भिन्नौ अन्यतरात् शिशोः जीवनम्। मे तु त्वं उभयम्। (हे) विश्वभृत्, त्वयि निर्घृणे किं कार्यम्?।३४। 'साहसं मा कुरु' इति उक्त्वा यथा विः दारु भिनत्ति तथा साहजिकैः दोषैः अहं निन्दामि, अहः करोमि।३५।

तसे तर (वेदांतदृष्ट्या) या जगताचे उपादान कारण आणि निमित्त कारणही तुझ्याकडेच येते; (कारण तूच हे विश्व स्वतःपासूनच निर्माण केले आहे. *'स ईक्षत लोकान्नु सृजा'* इत्यादिना तुझे निमित्तत्व, तर *'तदाऽऽत्मानँ स्वयमकुरुत्'* या वाक्याने उपादानतत्व, सिद्ध होते. अशा रीतीने तुझे अभिन्न निमित्तोपादानत्व वेदप्रामाणित आहचे. पण लौकिक अथवा सांख्य दृष्ट्या जरी विचार केला तर बालकाचे (वेदांत न जाणणाऱ्या जीवाचे) माता आणि पिता दोघे निरनिराळे असल्याने शिशूची उपजीविका त्यांच्यापैकी एकाकडूनही होऊं शकते. (इथे **पितरौ** ह्याचा अर्थ एकशेष द्वंद्व समासानुसार माता आणि पिता असा होतो.) तू तर सर्वेश्वर असल्याने, उपनिषदांवर विश्वासलेल्या मला दोन्ही - माता आणि पिता, आहेस. आपणच गीतेत (९:१७) 'मीच या जगाचा पिता, माता, पालनकर्ता आणि पितामहसुद्धा आहे.' असे म्हटले आहे. तरी हे विश्वपालका, आपणच असे कठोर झाल्यावर (निदान तसे मला भासत असतां) मी काय बरे करावे?३४. 'मग हे अपराधरूपी पाप तू करतोसच का?' असे विचारशील तर ते माझ्या सहज (प्राकृतिक) दोषाने घडते आहे हे दृष्टांतासह स्पष्ट करतात. कोणी एक पक्षी 'साहस करू नये' असे म्हणत असतांनाच स्वतःच लाकूड पोखरत असतो. तद्वत्च मी माझ्या साहजिक दोषांनीच हे आपली निंदारूपी पाप करतो आहे.३५.

**आघे पुण्यवतः प्रोक्तं प्रायश्चित्तमवेक्ष्य माम् । आरात्पलायते भीत्या शार्दूलमिव शृङ्गिणी ।।३६।।**

**मालिन्यदोषभीत्या तु माषराशेः पृथक्किमु । कार्यं जपो मदङ्गाघात्किं करोति पृथग्घरे ।।३७।।**

**मादृक्पापो हरे नास्ति भवादृङ् नास्ति पापहा । पाह्यनन्याश्रयं दीनं त्यक्त्वौदासीन्यमीश माम् ।।३८।।**

पुण्यवतः आघे प्रोक्तं प्रायश्चित्तं मां अवेक्ष्य, शार्दूलं शृङ्गिणी इव आरात् पलायते।३६। मालिन्य+दोष+भीत्या तु माष+राशेः किं पृथक् कार्यम्? (हे) हरे, मत्+अङ्ग+अघात् जपः किं पृथक् करोति?।३७। (हे) हरे, मादृक् पापः न अस्ति, भवादृक् पापहा न अस्ति। औदासीन्यं त्यक्त्वा मां दीनं अन्+अन्य+आश्रयं पाहि।३८।

'अरे मग प्रायश्चित्त कर!' असे म्हणशील तर *'विध्यपराधे प्रायश्चित्तम्'* ह्या श्रौतसूत्रानुसार पुण्यवान माणसाने थोडेफार पाप केले तर त्याचा दोष परिहार करण्यासाठी ऋषिमुनींनी जे प्रायचित्त सांगितले आहे ते माझ्यासारख्या महापाप्याला पाहून, सिंहाला पाहून धावणाऱ्या गाईसारखी, लांबूनच पळून जातात.३६. जपादींनी पापाचा परिहार करायला आपण सांगाल तर मलिनतेच्या भयाने माझ्या देहांतून पाप वेगळे करणे हे उडदाच्या राशींतून काळेपणा दूर करण्यासारखे दुरापास्त आहे. जप तेथे काय करील? हे हरी अशा संबोधनाने *'नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी जन'* ह्या स्कंदपुराणांतील वचनानुसार (वैष्णवखंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३) परमेश्वराच्या नांवांत ही शक्ती आहे असेच सुचविले आहे.३७. हे हरी माझ्यासारखा पापी नाही आणि आपल्यासारखा पाप घालविणारा नाही. अशा रीतीने दुसरा कांहीही आधार नसलेल्या मला दीनाला, हे ईश्वरा, आपली उदासीनता सोडून माझे रक्षण करा.३८.

**द्रवन्त्यपि शिलाः श्रुत्वा मद्विलापं दयानिधे । कारुण्यं ते कुतो यातं म्रियमाणं न वेत्सि यत् ।।३९।।**
**एवं विलाप्य मार्गेऽसौ गुरुध्यानैकतानहृत् । तस्थौ प्रायोपवेशेन दैवात्स्वप्नस्तदाभवत् ।।४०।।**
**धेनुर्वत्सं यथोपैति भगवान्भक्तवत्सलः । प्राप्यावधूतवेषेण स्वप्नेऽमुं पर्यतोषयत् ।।४१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते चरितानुसंधानं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

(हे) दयानिधे मत्+विलापं श्रुत्वा शिलाः अपि द्रवन्ति। (हे) करुणा+निधे ते कारुण्यं कुतः यातं, यत् म्रियमाणं न वेत्सि?।३९। एवं असौ मार्गे विलाप्य गुरु+ध्यान+एकतान+हृत् प्रायोपवेशनेन तस्थौ। तदा दैवात् स्वप्नः अभवत्।४०। यथा धेनुः वत्सं उपैति (तथा) भक्तवत्सलः भगवान् अवधूत+वेषेण प्राप्य अमुं स्वप्ने पर्यतोषयत्।४१।

'मी कुठे औदासीन्य धारण केले आहे?' असा प्रश्न अपेक्षून पुढे सांगतात. हे दयासागरा, हृदयशून्य अशा पाषाणांनासुद्धां पाझर फोडणारा माझा शोक ऐकूनसुद्धा आपल्यावर त्याचा कांहीच परिणाम दिसत नाही आणि मरणासन्न अशा माझ्याकडे आपण लक्ष देत नाही. आपलें कारुण्य कुठे हो गेले?३९. अशा प्रकारे हा नामधारक शोक करीत वाटेमध्ये गुरुप्राप्तीचा उपाय म्हणून अनन्य चित्ताने गुरुचिंतनांत मग्न होऊन प्रायोपवेशन करीत राहिला. *'संन्यासवत्यनशने पुमान् प्रायः'* ह्या अमरकोशांत सांगितलेल्या लक्षणाप्रमाणे (२:७:५२) सर्वसंगपरित्याग करून आमरण उपोषणाला बसला. त्या वेळी ध्याननिष्ठ असूनही चित्तांत लय म्हणजे निद्रेचा प्रादुर्भाव करणाऱ्या प्राक्तनयोगाने, जागेपणीही सत्याची प्रचीती देणारे स्वप्न झाले. मिथ्या स्वप्नदर्शनांतूनही सत्याची प्रचीती होऊं शकते याला प्रमाण म्हणून भगवत्पूज्यपादाचार्यांच्या शतश्लोकींतील (३८) वचन उद्धृत केले आहे. *'स्वाप्नादेव प्रसादादभिलषितफलं*

*सत्यतां प्रातरेति। सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति..'*.४०. नवप्रसूत गाय (भगवंताचे वात्सल्य प्रकट करणारा हा दृष्टांत आहे) जशी वासराकडे (धांवून) जाते त्याप्रमाणेच भक्तवत्सल भगवंतांनी अवधूतवेषाने स्वप्नांत येऊन ह्या नामधारकाचे समाधान केले.४१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील पहिला अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ज्ञानयोगः।

## ।। अथ द्वितीयोऽध्यायः ।।

**तत उत्थाय नालोक्य स्वप्ने दृष्टं द्विजोभितः । ध्यात्वा व्रजन्ददर्शाग्रे दयार्द्रं योगिनं समम् ।।१।।**
**अभिवाद्य स तं हर्ष-पुलकोद्गमशोभितः । प्रेमगद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे ।।२।।**
**माता पितोपदेष्टा भी-हर्ता भर्तापि मे भवान् । क्वायातोऽस्ति कुतो गन्ता दिष्ट्या मेऽद्याक्षिगोचरः ।।३।।**

तत उत्थाय द्विजः स्वप्ने दृष्टं अभितः न आलोक्य ध्यात्वा व्रजन् अग्रे दयार्द्रं समं योगिनं ददर्श।१। सः पुलक+उद्गम+शोभितः तं अभिवाद्य प्रेम+गद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे।२। भवान् मे माता, पिता, उपदेष्टा, भी+हर्ता अपि। क्व आयातः असि? कुतो गन्ता? अद्य दिष्ट्या मे अक्षि+गोचरः।३।

**द्वितीयाध्यायी ब्रह्मोक्त गुरुशिष्यकथा । सांगे सिद्ध नामधारका भक्ति दृढ करावया ।।१।।**

तेव्हां, स्वप्नानंतर उठून, स्वप्नांत पाहिलेला तो पुरुष आतां न दिसल्याने तो ब्राह्मण त्या पुरुषाला मनांत आठवीत आसपास धुंडाळून जातां समोरच दयार्द्र शत्रुमित्रभावरहित असा स्वप्नांत पाहिलेला योगी त्याला दिसला.१. नामधारकाने त्या योगी पुरुषाला अभिवादन केले आणि आनंदाने पुलकित होऊन प्रेमाने गहिंवरलेल्या वाचेने बोलण्यास आरंभ केला.२. साधारणतः सर्वांना माता, पिता, गुरू इत्यादि उपकारकर्ते असतात. माझ्यासाठी मात्र परमानंद देणारे आपणच हे सर्व आहांत. अथवा 'आम्हांला अविद्येच्या पलीकडे तारून नेणारा तूंच आमचा पिता आहेस' या श्रुतीने (प्रश्न उ. ६.८) सांगितल्याप्रमाणे अध्यात्मज्ञान देण्यास समर्थ असे आपणच मला मातादिक आहांत. तसेच ज्ञानी पुरुष ईश्वराशी एकरूपच असल्याने *'पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः'* या गीतावचनाप्रमाणे (९:१६) आपणच सर्व विश्वाचेच मातापिता आहांत. महाराज, आपण कुठून आलां आहांत व कुठे जात आहां? (उलटसुलट अव्ययाची योजना नामधारकाच्या संभ्रमाने झाली आहे.) माझ्या सुदैवाने आज आपण माझ्या दृष्टीस पडलां आहांत.३.

**कालेऽनुकूले प्रतीपे ना स्वैः सद्भिश्च युज्यते । निःसंगस्य मुमूर्षोर्मे सर्व एवाद्य वै भवान् ।।४।।**
**नामधारकशर्माहं विप्रस्तप्तोऽत्र सद्गुरुम् । द्रष्टुकामोऽयने क्लेशान्मुमूर्षुरभवं प्रभो ।।५।।**
**इन्द्रियोच्छोषणं शोकं कोऽपि हर्तुं न मे प्रभुः । जाने त्वमेव शक्नोषि हृष्टं दृष्ट्यैव हृद्धि मे ।।६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**योगिध्येयस्त्रिमूर्त्यात्मा यद्भक्ता भुक्तिमुक्तिगाः । योऽस्ति भीमातटेऽसौ तच्छिष्यः सिद्धो धराचरः ।।७।।**

अनुकूले, प्रतीपे काले स्वैः, सद्भिः च युज्यते। मे निःसङ्गस्य मुमूर्षोः भवान् एव सर्व वै।४। (हे) प्रभो, अहं नामधारक+शर्मा विप्रः तप्तः अत्र सद्गुरुं द्रष्टु+कामः अयने क्लेशात् मुमुर्षुः अभवम्।५। मे इन्द्रिय+उच्छोषणं शोकं हर्तुं कः अपि न प्रभुः। जाने त्वं एव शक्नः असि (यतः) दृष्ट्या एव मे हृत् हृष्टं हि।६। सिद्ध उवाच। योगि+ध्येयः त्रि+मूर्ति+आत्मा यत्+भक्ताः भुक्ति+मुक्ति+गाः, यः भीमा+तटे अस्ति, असौ तत्+शिष्यः धरा+चरः सिद्धः।७।

**ना** म्हणजे पुरुषाला अर्थादिकांची अनुकूलता असतांना आपल्या सख्यासोयऱ्यांची सोबत असते. प्रतिकूल काळीं मात्र (सखेसोयरे दुरावल्याने) संतांचाच आश्रय असतो. स्त्रीपुत्रादिकांपासून वियुक्त होऊन मरणोन्मुख झालेल्या माझे खरोखर आपणच सर्व कांही आहांत.४. नामधारक नांवाचा मी ब्राह्मण आहे आणि सदुगुरूंच्या दर्शनाला निघालो असतां मार्गांत झालेल्या कष्टांनी मी मरायला टेकलो आहे. इथे शर्मा शब्दांत ब्राह्मण जातीचा उल्लेख असूनही पुन्हां विप्र शब्दाची योजना नामधारकाचे वेदाध्ययन झाले आहे हे सुचविण्यासाठी केली आहे.५. माझ्या सर्व इंद्रियांचे शोषण करणाऱ्या ह्या शोकाचा परिहार करण्यास कुणीच समर्थ नाही. आपणच ते करूं शकाल असे जाणवते; कारण आपल्या दर्शनानेच माझ्या मनाला हर्ष झाला आहे.६. सिद्धमुनी उत्तर देतात. 'योगी ज्याचे ध्यान करतात, ज्याचे भक्त ऐहिक सुख तसेच मोक्ष पावतात अशा ह्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तिस्वरूप किंवा सत्-चित्-आनंदस्वरूप असलेल्या, भीमातीरी वास करणाऱ्या (श्रीदत्तप्रभूंचा) सिद्ध नांवाचा मी शिष्य असून ह्या पृथ्वीवर (योगबलाने अव्याहत, स्वैर गतीने) संचार करतो. तिसऱ्या श्लोकांत 'कुठून आलांत व कुठे जातां' असा प्रश्न विचारला त्याचे हे उत्तर आहे.'७.

**।। नामधारक उवाच ।।**

**सद्गुरुः सोऽपि भगवानस्माकं कुलदैवतम् । श्रद्धाभक्त्या भजे तं मां कष्टाब्धौ मज्जयत्यहो ।।८।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**स सद्गुरुस्त्रिमूर्त्यात्मा रुष्टेष्वन्येष्वयं प्रभुः । कोऽपि नास्मिन्लौकिकेऽपि नेष्टोऽस्यासीति भाति मे ।।९।।**
**संशयात्माऽश्रद्दधानः क्वापि कैर्नैव गोप्यते । त्रय्यात्मश्रीगुरुस्त्यक्त-संशयात्मेश्वरोऽत्र कः ।।१०।।**

नामधारक उवाच। सः सद्गुरुः भगवान् अस्माकं अपि कुल+दैवतम्। तं श्रद्धा+भक्त्या भजे। अहो कष्ट+अब्धौ मज्जयति।८। सिद्ध उवाच। सः सद्गुरुः त्रि+मूर्ति+आत्मा अन्येषु रुष्टेषु अयं प्रभुः। अस्मिन् (रुष्टे) कः अपि (प्रभुः) न, लौकिके अपि (रुष्टे कः अपि प्रभुः न।) (त्वं तस्य) इष्टः न असि इति मे भाति।९। अश्रद्दधानः संशय+आत्मा क्वः अपि कैः न एव गोप्यते। त्रयि+आत्म+श्रीगुरु+त्यक्त+संशय+आत्मा+ईश्वरः कः।१०।

तोच सद्‌गुरू भगवान् दत्त आमचे कुलदैवत आहे. अहो, श्रद्धेने व भक्तीने आम्ही त्याला भजत असूनही (तो मात्र) आम्हांला दुःखसागरांत लोटून देत आहे.८. सिद्धमुनी म्हणतात, अन्य कोणा ब्रह्मादिकांचा रोष झाला असतां हा त्रयमूर्ति सद्‌गुरू आपल्या भक्तांचे रक्षण करण्यास समर्थ आहे. परंतु ह्यांचाच नव्हे तर अगदी लौकिक गुरूंचाही रोष झाला तर कुणीच रक्षण करूं शकत नाही. मला वाटते तू ह्या सद्‌गुरूंच्या कृपेला पात्र नसावास.९. हा आत्मा स्थूलदेहरूप आहे, की सूक्ष्मदेहरूप अथवा ह्या दोन्हीहून वेगळा? वेगळा असेल तर अणूच्या आकाराचा आहे की मध्यम आकाराचा आहे की सर्वगत आहे? जड आहे, द्रव्यबोधात्मक आहे की चिद्रूप आहे? हा ईश्वरच आहे की ईश्वराहून भिन्न आहे? प्रपंच सत्य आहे की मिथ्या? मोक्षाचे साधन कर्म आहे, की योग आहे की ज्ञान आहे? अशा बुद्धिजन्य, संसर्गजन्य आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनाने उत्पन्न झालेले संशय ज्याच्या चित्तांत घर करून राहिलेले आहेत. त्यांतही वेदांतवाक्यावर श्रद्धा नसलेल्या संशयग्रस्त पुरुषाचे रक्षण कुणीही कुठेही करूं शकणार नाही. त्रिमूर्त्यात्मक सद्‌गुरूंनी टाकलेल्या ह्या संशयात्म्यावर कोण अनुग्रह करील? अर्थात् कुणीच नाही.१०.

॥ नामधारक उवाच ॥

**रुष्टेऽपि लौकिके नेशःकोऽपीत्युक्तं वदस्व चेत् । प्राग्वृत्तं चैष त्र्यात्मा कथं मे छिन्धि संशयम् ॥११॥**

॥ सिद्ध उवाच ॥

**पुरा निराशिषोऽप्येको बहुस्यामित्यभून्मतिः । या योगनिद्रितस्यैषा विष्णोर्मायाऽनया जगत् ॥१२॥**
**सृष्टं प्राङ्नाभिकमलादभवच्चतुराननः । ददौ तस्मै विनीताय वेदांस्तैरसृजज्जगत् ॥१३॥**

नामधारक उवाच। लौकिके अपि रुष्टे न कः अपि ईशः इति उक्तम्। प्राक्+वृत्तं चेत् वदस्व। कथं त्रयि+आत्मा च। संशयं छिन्धि।११। सिद्ध उवाच। पुरा निः+आशिषः एकः अपि योग+निद्रितस्य विष्णोः या मतिः अभूत् एषा माया। अनया जगत् सृष्टम्। प्राक् नाभि+कमलात् चतुः+आननः अभवत्। तस्मै विनीताय (विष्णुः) वेदान् ददौ। (सः) तैः जगत् असृजत्।१२-१३।

नामधारक विचारतो. महाराज! 'लौकिक गुरूचाही जर रोष झाला तरीही त्यापासून सोडवणारा कुणी नाही' असे जे आपण बोललांत त्याचा कांही पूर्वेतिहास असला तर सांगावा. तसेच हा दत्त त्रयमूर्ति कसा आहे हा माझा संशयही आपण फेडावा.११. सिद्धमुनी उत्तर देतात. पूर्वी - म्हणजे नैमित्तिक कल्पाच्या काळी, निरिच्छ अशा परमात्म्याला आपण एकच आहो ते बहुरूप व्हावे अशी बुद्धी झाली. ते का? या प्रश्नाचे उत्तर देतात की नैमित्तिक प्रलयाच्या वेळी सर्व प्रणिमात्रांच्या वासना परमेश्वराच्या ठायीं लीन झाल्या तीच योगनिद्रा. ह्या योगनिद्रा धारण केलेल्या व्यापनशील परमात्म्याला त्या सर्व प्राणिमात्रांच्या फलोन्मुख झालेल्या कर्मांमुळे आपण अनेक रूपे घ्यावीत अशी मतिरूप इच्छा झाली (ऋग्वेद १०:१२९:३-४). इच्छा, ज्ञान आणि क्रिया शक्तिरूप अशा ह्या विष्णूची ही मिथ्यारूप असली तरीही कार्यावरून तिचे अनुमान करतां येते. अशा मिथ्या असूनही भावरूप (सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय) म्हणविलेली माया भगवंताच्या दृष्टिमात्राने उद्दीपित झाली आणि ती सचेतन झाल्यासारखी भासली. तिच्या द्वारे जगताची उत्पत्ति केली. (पुढच्या श्लोकांतील **सृष्टं** हा शब्द जोडून.) वास्तविक उत्पत्ति-स्थिति-लय ही मायेची कार्ये असूनही विष्णुस्वरूप ब्रह्माला कल्पनेने दिलेले कारणत्व आहे. *'जन्माद्यस्य यतोऽन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (१:१:२) हे ब्रह्माचे तटस्थलक्षण आहे.११.

**कृतं त्रेतां द्वापरं च सधर्मं व्यसृजत्कलिम् । वर्णाश्रमविभागेन मनुष्यस्थितिहेतवे ।।१४।।**
**वैराग्यज्ञानवान्सत्यः सत्यवाग्यज्ञसूत्रभृत् । यज्ञसंभारधृक्त्रेता द्वापरस्तु सुशस्त्रभृत् ।।१५।।**
**पुण्यपापोग्रताशान्ति-दयानैष्ठुर्यसंयुतः । कलिस्तु लिङ्गजिह्वाभृत्कच्चरोऽसन्पिशाचवत् ।।१६।।**

(सः) मनुष्य+स्थिति+हेतवे वर्ण+आश्रम+विभागेन कृतं, त्रेतां, द्वापरं च कलिं स+धर्मं व्यसृजत्।१४। सत्यः वैराग्य+ज्ञानवान् सत्य+वाक् यज्ञ+सूत्र+भृत्। त्रेता यज्ञ+संभार+धृक्, द्वापरः तु सु+शस्त्र+भृत् पुण्य+पाप+उग्रता+शान्ति+दया+नैष्ठुर्य+संयुतः। कलिः तु लिङ्ग+जिह्वा+भृत् कच्चरः असन् पिशाचवत्।१५-१६।

मग सृष्टीची प्रक्रिया सांगतात. प्रथम (श्रीविष्णूंच्या) नाभिकमलांतून चतुर्मुख ब्रह्मदेवांचा उद्‌भव झाला. विनीत अशा त्या ब्रह्मदेवाला (भगवंतांनी) वेद दिले. (ब्रह्मदेवांनी) त्या वेदांच्या आधारे *'धाता यथापूर्वमकल्पयत्'* या श्रुतिवचनानुसार (ऋग्वेद १०:१९०:३) जगताची निर्मिति केली. भगवंतांनी त्याला वेद दिले यावरून हे स्पष्ट होते की *'शास्त्रयोनित्वात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:१:३) प्रतिपादिल्याप्रमाणे अनादि विष्णूच वेदांचे कर्ते आहेत. इतर कुणी अर्वाचीन नव्हेत.१२. वैराग्य, ध्यान इत्यादि धर्मांनी युक्त कृतयुग, यजनादिधर्मांनी युक्त त्रेतायुग, अर्चनादि धर्माने युक्त द्वापार आणि कीर्तनधर्माने युक्त कलि अशा चार युगांची उत्पत्ती करून मानवाच्या उत्कर्षासाठी ब्राह्मण, क्षत्रिय, वैय आणि शूद्र अशा चार वर्णांची तसेच ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांची विभागणी केली.१४. सत्य(कृत)युग वैराग्य आणि ज्ञान यांनी युक्त, सत्यभाषी आणि यज्ञोपवीत धारण करणारे आहे. म्हणजेच त्या युगांतील प्रजेत हे गुण होते. त्याचप्रमाणे त्रेतायुग यज्ञसामग्री धारण करणारे तर द्वापारयुग शस्त्रास्त्रांनी सज्ज असे केले.१५. (कृतयुगांत चतुष्पाद असलेल्या धर्माचा) एक एक पाद त्रेतादि युगांत क्रमाने कमी होऊन द्वापारांत द्विपाद झाल्याने पाप व पुण्य, उग्रता व शांती तसेच दया व निष्ठुरता यांचे मिश्रण असते. तर कलियुगांत धर्माचा एकच पाय राहतो. **'तु'** शब्दाने कलियुगाचे वेगळेपण सूचित केले आहे. त्याने एका हाताने जिह्वा आणि दुसऱ्या हाताने लिंग धरले आहे. म्हणजेच या युगांतील लोक जिभेचे चोचले पुरविणारे आणि कामपर असतील. कलियुग मळकट, असाधु आणि पिशाचासारखे वेडेवांकडे चाळे करणारे आहे.१६.

**एकैकं यतकालं कौ प्रेरयद्विश्वहेतवे । प्रयाणकाले कलये प्रोक्तां गुरुकथां शृणु ।।१७।।**

**।। कलिरुवाच ।।**

**कथं यास्ये वृषपर-प्रशान्तजनसेविताम् । भुवं श्रुत्वापि मे चेतः खिद्यतेऽङ्गं च तप्यते ।।१८।।**
**छेत्ताहं धर्मसेतोः शुक्कलहद्वेषतापकृत्। भ्रातान्यस्त्रीस्वहर्ता मे षड्-द्विड्भाक्प्राणवल्लभः ।।१९।।**
**क्षतव्रतोऽपि मे प्राणो नास्तिकोऽधार्मिकोऽपि मे । ये स्थिता भारते वर्षे धार्मिकास्ते ममारयः ।।२०।।**

कलिः उवाच। वृषपर+प्रशांत+जन+सेवितां भुवं कथं यास्ये? श्रुत्वा अपि मे चेतः खिद्यते, अङ्गं च तप्यते।१८। अहं धर्म+सेतोः छेत्ता, शुक्+कलह+द्वेष+ताप+कृत्। भ्राता+अन्य+स्त्री+हर्ता षड्+द्विड्+भाक् मे प्राण+वल्लभः।१९। क्षत+व्रतः अपि मे प्राणः, नास्तिकः अधार्मिकः अपि। ये भारते वर्षे स्थिताः धार्मिकाः ते मम अरयः।२०।

प्रत्येक युगाला त्याचा कालावधि नेमून जगताच्या स्थैर्यासाठी भूमीवर पाठविले. कृताचा कालावधि सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षे, त्रेतायुगाचा बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षे, द्वापाराचा आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षे तर कलीचा चार लक्ष बत्तीस हजार वर्षे असा आहे. कलियुगाला (भूमीवर) पाठवितांना (ब्रह्मदेवाने) सांगितलेली गुरुकथा तूं ऐक.१७. ब्रह्मदेवाने पृथ्वीवर जाण्याची आज्ञा केल्यावर धर्माला घाबरून कली म्हणतो, 'धर्मपर प्रशांत असे लोक ज्या भूमीवर राहतात तिथे मी कसा जाऊं? त्या भूमीची वार्ता ऐकूनसुद्धा माझे मन खिन्न होते आणि माझ्या अंगाचा दाह होतो.'१८. 'मी धर्ममर्यादेचा उच्छेद करणारा आहे. शोक, कलह, द्वेष आणि ताप करणारा आहे. परधन व परस्त्री यांचा अपहार करणारे मला भावासारखे प्रिय आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांचे दास माझे प्राणसखे आहेत.'१९. 'व्रत, नेम सोडून देणारे, नास्तिक (परलोक नाहीच असे मानणारे) आणि अधर्मरत (धर्मविरुद्ध आचरण करणारे) जणूं माझे प्राणच आहेत. भारतवर्षांत राहणारे धार्मिक माझे वैरी आहेतच कारण त्यांचा मला ताप होतो.'२०.

**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरेक्षणात् । बहिर्यान्त्यसवो मेऽपि योगिज्ञानीक्षणात्क्षणात् ।।२१।।**

**।। ब्रह्मोवाच ।।**

**आसुर्या संपदा गच्छ वशा लोका भवन्ति ते । शतायुर्हि नरः कोऽपि धन्यो भूयान्न तं जहि ।।२२।।**
**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरो नरः । त्वद्दोषैर्लिप्यते नैव गुरुभक्तो विशेषतः ।।२३।।**
**नाम्बुनाब्जदलं यद्वल्लिप्यतेऽघैर्गुरुप्रियः । नैव जेतुं गुरोर्भक्तं देवा अपि न शक्नुयुः ।।२४।।**

गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपर ईक्षणात्, योगि+ज्ञानी+ईक्षणात् क्षणात् मे असवः बहिः यान्ति।२१। ब्रह्मा उवाच। आसुर्या संपदा गच्छ, लोकाः ते वशाः भवन्ति। नरः शत+आयुः। कः अपि धन्यः भूयात्। तं न जहि।२२। गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपरः नरः त्वत्+दोषैः न लिप्यते। विशेषतः गुरु+भक्तः न एव।२३। यत्+वत् अम्बुना अब्ज+दलं अघैः गुरु+प्रियः न लिप्यते। देवाः अपि गुरुभक्तं जेतुं न शक्नुयुः।२४।

'गुरु, ईश्वर, सात्त्विक ब्राह्मण आणि मातापितरांची सेवा करणाऱ्यांना (केवळ) पाहिल्यानेही माझे प्राण कंठाशी येतात. तसेच योगी, ज्ञानी यांच्या दर्शनाने मी क्षणांत मरायला टेकतो.'२१. ब्रह्मदेव त्याला धीर देतात, 'दंभ, दर्प, अभिमान, क्रोध आणि पारुष्य (कठोर वचन) ही आसुरी संपदा (भ.गी.१६:४) तुझ्याबरोबर पाठवीत आहे. त्यांना घेऊन जा म्हणजे लोक तुला वश होतील. माणसाचे आयुष्य केवळ शंभर वर्षेच असेल; एखादाच पुण्यवान् होईल. त्याचा घात करू नको.'२२. गुरू, ईश्वर, देव व ब्राह्मण यांची सेवा करणाऱ्यांना, विशेषतः गुरुभक्तांना तुझा दोष कधीच लागणार नाही.'२३. 'ज्याप्रमाणे कमलाच्या पानाला पाणी चिकटत नाही (छांदोग्योपनिषत् ४:१४:३) त्याप्रमाणे श्रीगुरुकृपापात्र शिष्याला पाप स्पर्शूं शकत नाही. गुरूच्या भक्ताला देवादिकसुद्धां जिंकूं शकत नाहीत, त्याला विघ्न करूं शकत नाहीत; मग इतरांची काय कथा?'२४.

**।। कलिरुवाच ।।**

**गुरुर्वरोऽमरेभ्योऽपि कथं वद हि यत्प्रियः । केनाप्यजेय इत्येतत्प्राग्वृत्तं क्वापि चेद्वद ।।२५।।**

**।। ब्रह्मोवाच ।।**

**ज्ञानं गुरुं विना न स्याद्यस्य कस्यापि निर्जराः । गुरुभक्त्यैव सिद्धार्थाः स्युस्ततोऽप्यधिको गुरुः ।।२६।।**

कलिः उवाच। यत् प्रियः केन अपि अजेयः (सः गुरुः) अमरेभ्यः अपि वरः कथं, वद। इति एतत् क्व अपि प्राक् वृत्तं चेत् वद।२५।
ब्रह्मा उवाच। यस्य कस्य अपि गुरुं विना ज्ञानं न स्यात्। निर्जराः अपि गुरुभक्त्या एव सिद्ध+अर्थाःस्युः। ततः अपि अधिकः गुरुः।२६।

कलि प्रश्न करतो, 'गुरू देवापेक्षांही इतके श्रेष्ठ कसे ज्यायोगे त्यांचे भक्तही अजिंक्य होतात? याविषयी कांही पूर्वेतिहास असल्यास सांगा.'२५. **देवतांना संसार आहे का?** ब्रह्मदेव कलीला सांगतात, 'गुरूशिवाय ज्ञान कुणालाही होत नाही. इंद्र, अश्विनीकुमार आदि देवही प्रजापति, दध्यङ्मुख इत्यादि गुरूंची भक्ती करूनच मोक्ष पावले. त्यामुळे त्यांच्यापेक्षां गुरू अधिक श्रेष्ठ आहेत.' 'स्वर्गस्थ इंद्रादि देवतांना कुठला संसार? आणि संसारच नसेल तर मोक्ष कशापासून?' ह्या शंकेचे समाधान असे आहे की श्रुतिवचनानुसार (ऐतरेय उ. १:२:१) त्या देवताही भूक-तहान इत्यादि स्वरूपाच्या संसारसागरांत पडतात; आणि त्यांतून मुक्त होण्यासाठी गुरूपसत्ति (सद्गुरूंना शरण जाणे) हाच उपाय सांगितला आहे. *'आचार्यवान् पुरुषो वेद'* (छां.उ. ६:१४:२) *'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ'* (कठ उ. १:२:९). तर मग मनुष्यांना तर यज्ञादि कर्माच्या अनुष्ठानाने चित्तशुद्धि होऊन मग मोक्ष मिळतो. देवांनी कर्मांद्वारे कुणाचे अनुष्ठान करायचे? मग चित्तशुद्धी कशी होईल? असे म्हणाल तर देवांना स्वभावतःच वेदांचे ज्ञान असल्याने मनुष्याप्रमाणे वेदाध्ययनासाठी उपनयनादि संस्कारांची त्यांना आवश्यकता नाही. तसेच त्यांचे अंतःकरण स्वभावतः शुद्ध असल्याने त्यांना यज्ञादि कर्मांचीही आवश्यकता नाही. ज्यांचे (मानवांचे) चित्त अशुद्ध असते त्यांना चित्तशुद्धी होऊन विविदिषा (वैराग्य) उत्पन्न होण्यासाठी कर्मकांडाद्वारे देवतांचे यजन करण्याची आवश्यकता असते.

**पुरा गोदावरीतीरे वेदधर्मैकदा मुनिः । बहुशिष्यप्रशिष्यस्तन्निष्ठां ज्ञातुमिदं जगौ ।।२७।।**
**तपसा क्षालितं पापं बहु प्रारब्धमस्ति मे । तद्भोग्यं व्याधिरूपेण काश्यां कस्तत्र रक्षकः ।।२८।।**

पुरा गोदावरी+तीरे एकदा वेदर्धमा बहु+शिष्य+प्रशिष्यः मुनिः तत् निष्ठां ज्ञातुं इदं जगौ।२७। तपसा पापं क्षालितं मे बहु प्रारब्धं अस्ति। ते व्याधि+रूपेण काश्यां भोग्यम्। तत्र कः रक्षकः अस्ति?२८।

*'तदुपरि बादरायणः संभवात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:३:२६) सांगितले आहे की मनुष्याच्या वर असणाऱ्या स्वर्गादिक लोकांतील देवतांनाही ज्ञानाचा अधिकार आहे असे बादरायणांचे मत आहे. उदाहरणार्थ, इंद्राने ब्रह्मचर्य धारण करून चार वेळां प्रजापतीला गुरू करून ज्ञान प्राप्त केले. तसेच अश्विनीकुमारांनी दध्यंचांना गुरू करून मधुब्राह्मण विद्या मिळविली. त्यावरून देवही गुरूची उपासना करून कृतार्थ झाले. अशा रीतीने गुरू त्यांच्याहून श्रेष्ठ आहेत.२६.

**प्रारब्ध भोगानेच संपवावे -** इथे एक पूर्वीचा इतिहास सांगतात. पूर्वी गोदावरीतीरावर वेदधर्मा मुनि रहात. त्यांना खूपसे शिष्य आणि प्रशिष्य होते. एकदा त्यांची श्रद्धा जाणण्यासाठी (त्यांच्या श्रद्धेची परीक्षा घेण्यासाठी) वेदधर्मा त्यांना म्हणाले.२७. 'धर्माने पापाचा नाश होतो' (महानारायणोपनिषत् १६:६), 'तपाने पापाचा नाश करतात' (मनुस्मृति १२:१०४) ह्या वचनांनुसार मी तपाने बरेच पाप धुवून टाकले आहे. तरी अजूनही माझे प्रारब्ध उरलेले आहे. ते व्याधिरूपाने मला काशीक्षेत्रांत राहून भोगायचे आहे. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो. ते पापरूप कर्म विविध आधी ज्यांत अंतर्भूत आहेत अशा व्याधीद्वारा मला भोगावे लागेल. किंवा (मुनींच्या मनोभूमिकेच्या संदर्भांत) असाही अर्थ करतां येईल की शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी असा दुःखद कर्मभोग आधीरहित (विवेकाने अनुद्विग्न मनाने) भोगायचा. त्या काशीत तुमच्यापैकी कोण माझे रक्षण करील?२८.

**गलत्कुष्ठाभिभूतस्य मम दंशादिवारणैः । क्षालनैरन्नदानैश्च प्रेम्णा कस्तत्र रक्षकः ।।२९।।**
**इति तस्य वचः श्रुत्वा तूष्णीं तस्थुर्भियाखिलाः । तत्रैको दीपको नाम शिष्य ऊचेऽभिवाद्य तम् ।।३०।।**
**न शेषयेद्दोषशेषं मोक्षविघ्नं भवत्कृतम् । ममात्मनैव भोक्ष्येऽहमनुज्ञां दातुमर्हसि ।।३१।।**

**।। गुरुरुवाच ।।**

**भोक्तव्यं स्वयमेवाघं नान्यद्द्वारेण तत्क्षयः । अतः कष्टेन तद्भोक्ष्ये काश्यां शक्तोऽसि चेदव ।।३२।।**

गलत्+कुष्ठ+अभिभूतस्य मम प्रेम्णा दंश+आदि+वारणैः, क्षालनैः अन्न+दानैः च कः तत्र रक्षकः?।२९। इति तस्य वचः श्रुत्वा अखिलाः भिया तूष्णीं तस्थुः। तत्र दीपकः नाम एकः शिष्यः तं अभिवाद्य ऊचे।३०। 'भवत्+कृतं मोक्ष+विघ्नं दोष+शेषं न शेषयेत्। अहं मम आत्मना एव भोक्ष्ये। अनुज्ञां दातुं अर्हसि'।३१। गुरुः उवाच। अघं स्वयं एव भोक्तव्यम्। अन्य+द्वारेण तत् क्षयः न। अतः तत् कष्टेन काश्यां भोक्ष्ये। (त्वं) शक्तः असि चेत् अव।३२।

तुम्ही सगळेच 'आम्ही करू' असे म्हणाल तर (नीट लक्ष देऊन) ऐका. पू आणि रक्त वाहणाऱ्या कुष्ठाच्या व्रणांनी व्यापलेल्या माझा माशा आणि किडांना निवारून, धुवून, मला अन्न भरवून, प्रेमपूर्वक तिथे माझा सांभाळ कोण करील?२९. हे त्यांचे बोलणे ऐकून सर्वजण भीतीने गप्प राहिले. एवढी अवघड जोखीम पत्करतां येत नाही आणि नाही म्हणावे तर गुरूंचा शाप होईल. तिथे एक दीपक नांवाचा शिष्य त्यांना (गुरूंना) वंदन करून म्हणाला.३०. 'दोषाचा अंशही बाकी ठेवूं नये कारण तो मोक्षाला विघ्न करतो. आपले दुष्कृत मी माझ्या देहानेच भोगून टाकतो. आपण मला आज्ञा करावी.'३१. गुरु म्हणतात 'आपले पाप आपणच भोगावे. दुसऱ्याकरवी त्याचा क्षय होत नाही. गरुडपुराणांत म्हटले आहे, 'जीव एकटाच जन्माला येते आणि एकटाच मरण पावतो. एकटाच पुण्याचा भोग घेतो आणि एकट्यानेच पापही भोगावे लागते.' (प्रेतकल्पखंड, धर्मकांड १२:२३-२४). त्यासाठी मी हे कर्म कष्टाने काशीत भोगणार आहे. तुझी शक्ती असेल तर मला सांभाळ.'३२.

**इत्युक्तं गुरुणाश्रुत्य काशीं तेन समं ययौ । कुष्ठी भूत्वापि सोऽन्धोऽघं बुभुजे भेज एष तम् ।।३३।।**
**गुरुर्गलद्व्रणत्रस्तः कार्याकार्याज्ञ एव सन् । प्रतीपाचरणैः शिष्यं शश्वद्व्यर्थं व्यताडयत् ।।३४।।**
**स सेवावसरे भिक्षां सेवां भिक्षाक्षणेऽपि तम् । ययाचेऽहनदप्राप्तौ नाखिद्यत सदाप्यसौ ।।३५।।**
**दत्तां याचितकां भिक्षां मुनिस्तद्दोषकीर्तनात् । भूमौ प्रक्षिप्य रुष्टोऽन्नं स्वाद्वानीहीत्युवाच तम् ।।३६।।**

इति गुरुणा उक्तं आश्रुत्य (दीपकः) तेन समं काशीं ययौ। सः अपि कुष्ठी अंधः भूत्वा अघं बुभुजे। एष तम् भेजे।३३। गुरुः गलत्+व्रण+त्रस्तः कार्य+अकार्य+अज्ञ एव सन् प्रतीप+आचरणैः शिष्यं व्यर्थं व्यताडयत्।३४। सः तं सेवा+अवसरे भिक्षां भिक्षा+क्षणे सेवां अपि ययाचे। अप्राप्तौ अहनत्। असौ सदा अपि न अखिद्यत।३५। मुनिः याचितकां भिक्षां दत्तां तत् दोष+कीर्तनात् भूमौ प्रक्षिप्य रुष्टः 'वादु अन्नं आनीहि' इति तं उवाच।३६।

हे गुरूंचे वचन अंगीकारून (दीपक) त्यांच्यासह काशीला गेला. *'या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरितसां। सा गतिः सर्वजन्तूनां गौतमीतीरवासिनां।। रेवातीरे तपः कुर्यान्मरणं जाह्नवीतटे। दानं दद्यात्कुरुक्षेत्रे तत्त्रयं गौतमीतटे।।'* (गौतमीमाहात्म्य) असे गोदावरीचे माहात्म्य असले तरी काशीक्षेत्राचा प्रभाव दर्शविण्यासाठी वेदधर्मा मुनि गोदावरीपासून काशीला गेले. तसेच कुष्ठादि रोगांचा स्वीकार केला. पुढे ५९व्या श्लोकांत हे स्पष्ट केले आहे. अशा रीतीने भोग भोगणाऱ्या आंधळ्या किंवा कुष्ठी गुरूची तो शिष्य सेवा करूं लागला.३३. वाहत्या व्रणांनी त्रासलेल्या गुरूंना योग्य अयोग्याचा विवेक राहिला नाही; आणि ते वेडेवाकडे वागून शिष्याला विनाकरणच मारूही लागले.३४. ते भिक्षेच्या वेळी सेवेची आणि सेवेच्या वेळी भिक्षेची मागणी करीत. लगेच न मिळाल्यास त्याला (शिष्याला) मारीत. तरीही तो खिन्न होत नसे. (प्रसन्नचित्ताने सेवा करीत असे.)३५. मागून आणलेली भिक्षा खातानाही, '(ते अन्न) थंड आहे, रुचकर नाही' अशी नावे ठेवीत रागाने जमिनीवर टाकून त्याला गोड अन्न आणायला सांगत.३६.

**भिक्षार्थमपि गच्छन्तं निवर्त्योचे कृता न मे । विण्मूत्रोत्सर्गसंशुद्धिः क्व यास्यश्नन्ति मक्षिकाः ।।३७।।**
**यथोक्तं कर्तुमुद्युक्तं निवार्योचे न वेत्सि माम् । क्षुधा कण्ठगतप्राणं देह्यन्नं पाप मे द्रुतम् ।।३८।।**
**भुक्त्वा याचितकान्नं स कदाचित्तात पुत्रक । श्रान्तोऽसि मे स्वपेत्युक्त्वा सुप्तेऽस्मिन्क्षुधितोऽब्रवीत् ।।३९।।**

भिक्षार्थं गच्छन्तं अपि निवर्त्य ऊचे, 'क्व यास्यसि? मे विट्+मूत्र+उत्सर्ग+संशुद्धिः न कृता। मक्षिकाः अश्नन्ति'।३७। यथा उक्तं कर्तुं उद्युक्तं निवार्य ऊचे, 'मां क्षुधा कण्ठ+गत+प्राणं न वेत्सि? पाप! द्रुतं मे अन्नं देहि'।३८। कदाचित् याचितक+अन्नं भुक्त्वा सः '(हे) तात, पुत्रक, श्रान्तः असि, स्वप,' इति उक्त्वा अस्मिन् सुप्ते 'क्षुधितः' अब्रवीत्।३९।

भिक्षेसाठी निघालेल्या शिष्याला थांबवून 'अरे! कुठे जातोस? माझ्या विष्ठा-मूत्रविसर्जनाची (तसेच जखमांतून वाहणाऱ्या पू, रक्त यांची) स्वच्छता केली नाहीस. या माशा मला चावताहेत,' असे बोलत.३७. त्यांच्या सांगण्यानुसार करायला गेल्यास 'अरे पाप्या! भुकेने माझे प्राण गळ्याशी आलेले तुला कळत नाहीत का? मला लवकर अन्न दे,' असे म्हणून त्याला अडवत. *'अन्नायुर्वा एष यद्वायुः'* या वचनानुसार (ऐ.उ. १:३:१०) अन्न हे प्राणाला शरीराशी जोडणारे बंधन असल्याने जीवनाचे कारण आहे. यासाठीच वाजसनेयांनी अन्नाला प्राणाला बांधून ठेवणारी दोरी (दाम) (बृ.उ. २:२:१) असा विचार मांडून अन्नाच्या अभावाने प्राण देठापासून वेगळ्या झालेल्या फळासारखा शरीरांतून सुटून जातो असे म्हटले आहे (बृ.उ. ४:३:३६). त्यानुसार वेदधर्मा 'मला अगतिकाला जर भुकेने मरण आले तर ती हत्या तुला लागेल.' म्हणून त्याला 'पाप्या!' असे संबोधन केले आहे.३८. कधी कधी शिष्याने मागून अणलेले अन्न खाऊन गुरूंनी म्हणावे, 'बाबा रे! माझं करून थकला असशील बाळा! झोप.' त्यावर तो शिष्य झोपतो न झोपतो तोंच 'अरे मला भूक लागलीय्,' असे म्हणावे. शिष्याला तात म्हटले आहे. 'तनोति' म्हणजे वंश वाढवतो तो 'तात'. शिष्य स्वतःच्या शिष्यप्रशिष्यांद्वारे गुरुपरंपरेचा विस्तार करतो. या अर्थाने हे संबोधन यथार्थच आहे.३९.

**एवं संछलितोप्येष भेजेऽखेदोऽनिशं गुरुम् । विस्मृतस्वात्मयात्रोऽपि मत्त्वा सर्वामरेश्वरम् ।।४०।।**
**गाङ्गाम्भो गुरुपादाम्भः साक्षाद्विश्वेश्वरं गुरुम् । सर्वानन्दनिधिं बुद्ध्वा मनो न क्वाप्यचोदयत् ।।४१।।**
**गुरुभक्तिसुपूतोऽभूज्ज्ञात्वा विश्वेश्वरोऽप्यमुम् । प्राप्योचे वरदोऽस्मीष्टं वरं वरय तेऽस्तु शम् ।।४२।।**
**दीपकोऽप्याह किं कार्यं वरेण गुरवस्तु मे । रुक्शान्त्यै वरमिच्छन्ति यदि पृष्ट्वा वृणोमि तत् ।।४३।।**

एवं संछलितः अपि एष अखेदः अनिशं विस्मृत+स्व+आत्म+यात्रः अपि गुरुं सर्व+अमर+ईश्वरं मत्वा भेजे।४०। गुरु+पाद+अम्भः गाङ्ग+अम्भः, गुरुं साक्षात् विश्वेश्वरं सर्व+आनन्द+निधिं बुद्ध्वा मनः क्व अपि न चोदयत्।४१। विश्वेश्वरः अपि अमुं गुरु+भक्ति+सुपूतः अभूत् ज्ञात्वा प्राप्य ऊचे, 'वरदः अस्मि। वरं वरय। ते शं अस्तु!'।४२। दीपकः अपि आह। वरेण मे किं कार्यम्? यदि गुरवः रुक्+शान्त्यै वरं इच्छन्ति (तं) पृष्ट्वा तत् वृणोमि।४३।

अशा रीतीने छळ करूनही हा शिष्य मात्र रात्रंदिवस न कंटाळता गुरूंनाच सर्वदेवेश्वर मानून त्यांची सेवा आपल्या देहाची पर्वा न करतां करीत होता.४०. गुरूच साक्षात् विश्वेश्वर आहेत, गुरूंचे चरणतीर्थ हेच गंगाजल आणि गुरूच सर्व सुखाचे आगर आहेत असे जाणून (त्या शिष्याने) आपले मन इतर कोणत्याही देवतांकडे जाऊं दिले नाही. इतर कुठल्याही दैवताच्या दर्शनादीचा संकल्पही मनांत येऊं दिला नाही.४१. हा दीपक गुरुभक्तीच्या योगाने अत्यंत पवित्र (शुद्धचित्त) झाला आहे असे जाणून भगवान् विश्वेश्वर त्याच्याकडे येऊन म्हणाले, 'मी (प्रसन्न होऊन) वर देत आहे. तू वर मागून घे. तुझे कल्याण असो.' दुःखाचा क्षय करणारे (*'श्यति'*) ते 'शं' म्हणजे कल्याण.४२. दीपक म्हणाला 'मला वर काय करायचा? माझ्या गुरूंना रोगाच्या शमनासाठी वर हवा असल्यास त्यांना (ते सध्यां इथेच असल्याने) विचारतो. त्यांची इच्छा असेल तर तो वर मी घेईन.'४३.

**इत्युक्त्वैत्य शशंसास्मै गुरुस्तप्तोऽब्रवीत्स तम् । भोगादेव क्षयं नेष्ये सेवायां मे बिभेष्यपि ।।४४।।**
**तच्छ्रुत्वा स तथेत्युक्त्वा शिवमेत्याब्रवीद्वरम् । न गुर्वसंमतं काङ्क्षे तच्छ्रुत्वागात्स दुर्मनाः ।।४५।।**
**निर्वाणमण्डपं गत्वा प्राह विष्णुमुखामरान् । चण्डो मुनिर्वेदधर्मा रुग्णस्तच्छिष्य उत्तमः ।।४६।।**
**गुरुभक्तः कम्बलाश्वतरासन्नोऽस्ति दीपकः । वरं दातुमगां प्रेम्णा नाददे स गुरूद्यतः ।।४७।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तं द्रष्टुकामो हरिर्ययौ । विष्णुर्दीपकमाहाङ्ग वरदोऽस्मि वरं वृणु ।।४८।।**

इति उक्त्वा अस्मै एत्य शशंस। गुरुः तप्तः, तं अब्रवीत्। भोगात् एव क्षयं नेष्ये। मे सेवायां बिभेषि अपि?।४४। तत् श्रुत्वा स 'तथा' इति उक्त्वा शिवं एत्य अब्रवीत्, 'गुरु+असंमतं वरं न काङ्क्षे'। तत् श्रुत्वा सः दुर्मनाः अगात्।४५। निर्वाण+मण्डपं गत्वा विष्णु+मुखान् अमरान् प्राह। चण्डः रुग्णः मुनिः वेदधर्मा तत् शिष्यः कम्बल+अश्वतर+आसन्नः दीपकः अस्ति। प्रेम्णा वरं दातुं अगात्। सः गुरु+उद्यतः न आददे।४७। इति ईश+वाक्यं श्रुत्वा हरिः तं द्रष्टुकामः ययौ। विष्णुः दीपकं आह, '(हे) अङ्ग, वरदः अस्मि, वरं वृणु।४८।

असे (विश्वेश्वरांना) बोलून (दीपकाने) गुरूंकडे येऊन त्यांना हे वृत्त सांगितले. (आपल्या रोगनिवारणासाठी वर मागून घेऊं का असे विचारले.) तेव्हां गुरू संतापून म्हणाले, 'माझे प्रारब्धकर्म मी भोगूनच संपवीन. माझ्या सेवेला भितोस (उबगलास) काय?'.४४. ते (सदगुरूंचे वचन) ऐकून 'तसे (ईश्वराला सांगतो)' असे म्हणून शंकरांकडे येऊन 'गुरूंना मान्य नसलेला (आपला) वर मला नको' असे सांगितले. हे ऐकून आपल्या वराच्या अनादराने हिरमुसलेले ते भगवान शंकर निघून गेले.४५. निर्वाणमंडपांत येऊन शंकरांनी विष्णुप्रमुख सर्व देवांना सांगितले की, 'वेदधर्मा नांवाचा अत्यंत कोपी मुनि व्याधिग्रस्त झाला आहे. त्याचा उत्तम शिष्य-.४६. गुरुभक्त दीपक कंबलाश्वतराजवळ गुरूंची सेवा करीत आहे. त्याला (त्याच्या तीव्र गुरुभक्तीने) प्रसन्न होऊन वर देण्यासाठी मी गेलो असतां तो गुरूंच्या सेवेत निमग्न असलेला शिष्य वर घेत नाही.'४७. हे ईश्वराचे वाक्य ऐकून श्रीहरि विष्णु दीपकाकडे जाऊन म्हणाले, 'प्रिय दीपका, मी वर द्यायला आलो आहे. तू वर मागून घे.'४८.

**तपसाष्टाङ्गयोगैश्च सूपायैर्मननादिभिः । उपवासैर्व्रतैर्योगैर्धर्मैर्गम्योऽस्मि नो नृणाम् ।।४९।।**
**गुरुसद्विप्रभक्तस्य मन्मयाभ्यन्तरात्मनः । निर्द्वन्द्वस्याऽपि साध्व्याश्च विष्णुर्दृश्योऽस्मि सर्वदा ।।५०।।**
**तस्मात्कष्टेन सुभग सद्गुरुः सेवितस्त्वया । तेनैव परितुष्टोऽस्मि वरं वरय मत्प्रिय ।।५१।।**

**।। दीपक उवाच ।।**

**श्रीसद्गुरुर्देवदेवो यतो ज्ञानं ततोऽमृतम् । अतोऽधिकं किमस्माकं भवन्ति त्वादृशा वशाः ।।५२।।**

तप+साष्टाङ्ग+योगैः मननादिभिः सु+उपायैः उपवासैः व्रतैः योगैः धर्मैः (अहं) नृणां गम्यः अस्मि नो।४९। गुरु+सत्+विप्र+भक्तस्य मत्+मय+अभ्यन्तर+आत्मनः निर्दन्द्वस्य साध्व्याः च (अहं) विष्णुः सर्वदा दृश्यः अस्मि।५०। तस्मात् (हे) सुभग, त्वया कष्टेन सद्गुरुः सेवितः, तेन एव परितुष्टः अस्मि। (हे) मत्प्रिय, वरं वरय।'।५१। दीपक उवाच। 'श्रीसद्गुरुः देवदेवः यतः ज्ञानम्। ततः अमृतम्। अस्माकं अतः अधिकं किम्? त्वादृशाः वशाः भवन्ति'।५२।

'कृच्छ्रादि तपाने, अष्टांग योग अथवा मननादि सुगम उपायांनी, उपवासानी, व्रतांनी, विविध योगांनी तसेच धर्माचरणानेही मानवांना मी अप्राप्य आहे.'४९. '(मात्र) गुरू, संत, ब्राह्मण यांची भक्ती करणाऱ्या (सुखदुःखादि) द्वंद्वातीत, माझ्याशी एकरूप झालेल्या भक्तांना आणि पतिव्रता स्त्रियांना मी सदैव दृश्य असतो.'५०. 'हे भाग्यवंता, (आमच्या दर्शनानंतर कुणी भाग्यहीन असूं शकतच नाही हे सुचविण्यासाठी) मोठ्या कष्टांनी तू सद्गुरूंची सेवा केली आहेस. त्यानेच मी परम प्रसन्न झालो आहे. माझ्या प्रिय भक्ता, वर मागून घे.'५१. दीपक म्हणाला, 'श्री म्हणजे ऐश्वर्याने युक्त असा हा सद्गुरू देवांचाही देव आहे.' यांतून 'आपणही रामकृष्णादि अवतारांमध्ये गुरुभक्तिरसाचा आस्वाद घेतला आहेच कीं!' असे जणू दीपक भगवान विष्णूंना सुचवीत आहे. 'कारण या गुरूंपासून ज्ञान आणि त्या ज्ञानापासूनच मोक्ष. अर्थात्च ह्या सद्गुरूंपेक्षा अधिक असे आम्हांला काय आहे? अर्थात्च कांही नाही. (त्यांच्या कृपेनेच) आपणांसारखेही आमच्या अधीन होतात. 'ब्रह्मज्ञानी पुरुषाला (त्याचे अंगभूतच असलेले) सर्व देव बली - इष्टार्थ अर्पण करतात' असे वेदवचन आहे. (तै.उ. १:५:३). एवढा श्रीगुरूंचा महिमा आहे.'५२.

**चेद्विश्वेशो यथा यातस्तथा गन्तुं न रोचते । गुरावेवाचलां भक्तिं देह्यन्यत्र वृणेऽध्रुवम् ।।५३।।**

**।। विष्णुरुवाच ।।**

**श्रद्धाभक्तिः सदा तेस्ति दास्येऽप्यन्यदयाचितम् । दत्ता भुक्तिश्च ते मुक्तिः सत्कीर्तिः स्मर्तृतापहृत् ।।५४।।**
**यः स्तौति सद्गुरुं भक्त्या वेदोपनिषदादिभिः। तुष्टिर्मे तेन दास्यैश्च सान्निध्यं तस्य मे सदा ।।५५।।**

विश्वेशः यथा यातः तथा गन्तुं न रोचते चेत् गुरौ एव अचलां भक्तिं देहि। अन्यत् अध्रुवं न वृणे।५३। विष्णुः उवाच। 'श्रद्धा+भक्तिः ते सदा अस्ति। अन्यत् अपि अयाचितं दास्ये। ते भुक्तिः मुक्तिः स्मर्तृ+ताप+कीर्तिः च दत्ता।५४। यः सद्गुरुं भक्त्या वेद+उपनिषदादिभिः स्तौति तेन, दास्यैः च मे तुष्टिः। तस्य मे सदा सान्निध्यम्।५५।

'परंतु भगवान विश्वेश्वरांसारखेच आपल्यालाही परत पाठविणे मला रुचत नाही. एवढ्यासाठी, आपण मला गुरूंच्या ठायी स्थिर भक्ती द्यावी. याहून दुसरा कोणताही स्त्रीपुत्रादि नाशिवंत वर मी इच्छित नाही. कारण ते ज्ञानाला प्रतिबंधच करतील.' गुरुभक्तीच खऱ्या अर्थाने अविनाशी आहे; कारण श्रुतिवचनानुसार तीच मोक्षपर्यवसायी आहे. श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटले आहे कीं, 'ज्याची ईश्वरावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच (परम भक्ती) गुरूंवर आहे, त्याच्यां(चित्तां)तच हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील.'५३. भगवान विष्णु (अत्यंत प्रसन्नतेने) म्हणतात, 'तुझी (सद्‌गुरूंच्या ठायीं) श्रद्धा व भक्ती निरंतर असेल. आणखीहि तूं न मागितलेले मी देत आहे. तुला सर्व इष्ट भोग दिले. आणि या भोगांमुळे चित्ताचा विक्षेप होऊन मुक्ती दुरावूं नये म्हणून तुला मुक्तीही दिली. विषयांचे सेवन करीत असतांनाही ह्या वरदानाच्या प्रभावाने तू त्यांत आसक्त होणार नाहीस. अर्थात्च चित्ताचा विक्षेप होणार नाही आणि मुक्तीचा मार्ग सुकर होईल. मुक्त होऊनसुद्धां भोगांत रमणारा अशी निंदा लोक करतील असे तुला वाटत असल्यास तुझी उत्तम आणि (तुझे) स्मरण करणाऱ्याचे त्रिताप हरण करणारी, कीर्तीही मी देत आहे.'५४. जो सद्गुरूंचे वेद आणि उपनिषदांनी स्तवन करतो त्या स्तवनाने तसेच त्याने केलेल्या सद्गुरूंच्या दास्याने मला संतोष होतो. मी सतत त्याच्या सन्निध असतो.'५५.

**कालादपि भयं नास्ति कुतोन्यस्मात्तु सिद्धयः । स्युस्तद्दास्योऽधिकं नात इत्युक्त्वान्तर्दधे हरिः ।।५६।।**
**शिष्योऽपि गुरवे सर्वं शशंस स तु तत्क्षणम् । प्रीतः सुखाकरकरं दधौ तन्मूर्ध्नि सद्गुरुः ।।५७।।**
**तेन सद्योऽभवच्छिष्यो वेदवेदाङ्गपारगः । कुशलः स्मर्तृतापघ्नो जीवन्मुक्तोऽखिलप्रियः ।।५८।।**
**काशीप्रभावमादेष्टुं शिष्यभावं परीक्षितुम् । वेदधर्माऽभवत्कुष्ठी पापशङ्का कुतो मुनेः ।।५९।।**

'कालात् अपि भयं नास्ति, कुतः अन्यस्मात्?। सिद्धयः तत् दास्यः स्युः। अतः अधिकं न।' इति उक्त्वा हरिः अन्तर्दधे।५६। शिष्यः अपि गुरवे सर्वं शशंस। सः सद्गुरुः तु तत् क्षणं प्रीतः सुख+आकर+करं तत् मूर्ध्नि दधौ।५७। तेन शिष्यः सद्यः वेद+वेदाङ्ग+पारगः कुशलः स्मर्तृ+ताप+घ्नः जीवन् मुक्तः अखिल+प्रियः अभवत्।५८। वेदधर्मा काशी+प्रभावं आदेष्टुं, शिष्य+भावं परीक्षितुं कुष्ठी अभवत्। मुनेः पाप+शङ्का कुतः?।५९।

'सर्वसंहारक काळापासूनसुद्धा त्याला भय नसेल; मग विघ्नादि इतरांची काय कथा? सर्व सिद्धि त्याच्या दासी होतील. ह्यापेक्षा अधिक देण्यासारखे काही राहिले नाही.' असे बोलून श्रीहरि अंतर्धान पावले.५६. शिष्याने गुरूंना हे सर्व निवेदन केले. त्या सद्गुरूंनीही प्रसन्न होऊन तत्क्षणी सुखाची खाण असलेला आपला हात त्या शिष्याच्या मस्तकावर ठेवला. 'ज्ञानप्राप्तीसाठी शिष्याची प्रज्ञाच कारण आहे' असे वसिष्ठ मुनींनी रामाला सांगितले असले (योगवासिष्ठ निर्वाण प्र. पूर्वार्ध ६:१३) तरी '(ज्ञानाला प्रतिबंधक) परिपक्व मलांना नष्ट करण्यासाठी शक्तिपात करून (सद्गुरू शिष्याचा) परम तत्त्वाशी योग करून देतात,' या उक्तीवरून गुरुप्रसादही ज्ञानप्राप्तीचे कारण आहे.५७. त्या शक्तिपाताने शिष्याला तात्काळ वेदवेदांगांचे शाब्द (परोक्ष) ज्ञान तर झालेच पण परब्रह्माचा साक्षात्कारही झाला; आणि तो सर्वांना प्रिय, कुशल, केवळ स्मरणामात्रे ताप नाहीसे करणारा जीवन्मुक्त झाला.५८. काशी क्षेत्राच्या प्रभावाचे प्रबोधन करण्यासाठी तसेच शिष्याच्या भक्तीची परीक्षा घेण्यासाठी वेदधर्मा कुष्ठी झाले. एऱ्हवी मननशील अशा त्यांना पापाची शंकासुद्धा कशी स्पर्शेल?५९.

**इत्याद्या भूरिशो वृत्ताः कले गुरुकथा भुवि । वक्तृश्रोतृमलघ्न्योऽतो भक्तं मा प्रेक्ष गां व्रज ।।६०।।**
**इत्यादिष्टः कलिर्धात्रा भुवमेत्य तथाऽकरोत् । महिमा लौकिकस्यायं किं पुनस्त्र्यात्मसद्गुरोः ।।६१।।**
**तत्सात्विकीं धृतिं लब्ध्वा दृढभक्त्यैव सद्गुरुम् । भजन्ति कृतकृत्यास्ते भवन्ति न ससंशयाः ।।६२।।**
**तस्माद्यदीच्छसि श्रेयः श्रद्धयाऽसंशयं भज । गुरुं नृधाम्ना क्रीडन्तं भवाब्धेः पारमेष्यसि ।।६३।।**

**इति श्रीगुरुचरिते गुरुशिष्यचरितानुकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।२।।**

'(हे) कले, इत्याद्याः भूरिशः वृत्ताः। गुरुकथा भुवि वक्तृ+श्रोतृ+मलघ्न्यः। अतः भक्तं मा प्रेक्ष गां व्रज'।६०। इति धात्रा आदिष्टः कलिः भुवं एत्य तथा अकरोत्। अयं लौकिकस्य (गुरोः) महिमा। किं पुनः त्रि+आत्म+सद्गुरोः?।६१। तत् सात्त्विकीं धृतिः लब्ध्वा दृढ भक्त्या एव सद्गुरुं भजन्ति (ते) कृतकृत्याः भवन्ति। न ससंशयाः।६२। तस्मात् यदि श्रेयं इच्छसि श्रद्धया असंशयं नृ+धाम्ना क्रीडन्तं सद्गुरुं भज। भव+अब्धेः पारं एष्यसि।६३।

(कथा पूर्ण झाल्यावर ब्रह्मदेव म्हणतात) 'हे कले, अशा बऱ्याच घटना भूलोकी झाल्या आहेत. ह्या गुरुकथा वक्त्याच्या आणि श्रोत्याच्या पापांचा नाश करतात. तरी तू गुरुभक्तांकडे पाहू नकोस. हे ध्यानात ठेवून तू पृथ्वीवर जा'.६०. अशा ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणे कलीने पृथ्वीवर येऊन तसेच केले. हा लौकिक सद्‌गुरूंचा महिमा आहे; तर मग त्रयमूर्ति सद्‌गुरूंचा महिमा काय सांगावा?६१. असा हा दृष्टांत सांगून झाल्यावर अर्थांतरन्यासाने तो दृढ करतात. त्यासाठी गीतेत प्रतिपादलेल्या सात्त्विक धृतीची (१८:३३) प्राप्ती करून जे दृढभक्तीने सद्‌गुरूंची भक्ती करतात ते कृतकृत्य होतात; 'ज्या एकनिष्ठ धृतीने मन, प्राण, इंद्रियें यांच्या क्रिया नियंत्रित करतां येतात.' अशी धृति नसलेले संशयग्रस्त मात्र होत नाहीत.६२. त्यासाठी कल्याणाची (मोक्षाची) इच्छा असेल संशयरहित होऊन मानव देहांत लीला करणाऱ्या गुरूंची भक्ती कर. भवसागर पार करशील. 'भवाब्धिं द्राक्तरिष्यसि' असाही पाठ आहे.६३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील दुसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अथ तृतीयोऽध्यायः।।

**नामधारक उवाच ।।**

**त्र्य्यात्मासौ कुतो जातो भूमौ नर इवेश्वरः । यं ब्रवीषि परं ब्रह्म तन्मे शुश्रूषवे वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**धन्योऽस्यनुगृहीतोऽसि यत्ते भक्तिरधोक्षजे । संजाता भवबन्धघ्नी हर्षो मेऽतीव वर्धते ।।२।।**

**कोऽपि गां पर्यटन्तं मां न पृच्छति गुरोः कथाम् । त्वयाद्य भक्तचन्द्रेण बोधाब्धिर्मे प्रपूरितः ।।३।।**

नामधारक उवाच। असौ त्र्य्यात्मा ईश्वरः, यं परं ब्रह्म ब्रवीषि, भूमौ नर इव कुतः जातः तत् मे शुश्रूषवे वद।१। सिद्ध उवाच। धन्यः असि, अनुगृहीतः असि, यत् ते अधोक्षजे भव+बन्ध+घ्नी भक्तिः संजाता। मे हर्षः अतीव वर्धते।२। गां पर्यटन्तं मां कः अपि गुरोः कथां न पृच्छति। अद्य त्वया भक्त+चन्द्रेण मे बोध+अब्धिः प्रपूरितः।३।

अनसूयेचे सत्त्व हराया तिसऱ्या अध्यायी। स्त्रीहट्ट पुरविण्या आली देवत्रयी। झाली बाळे, अशी सतीची मोठी पुण्याई। तशीच वदले सिद्ध सरस्वति अंबरीषकथाही।।१।।

आपण केलेल्या प्रश्नांपैकी एकाचे (गुरूंचा रोष झाल्यास कुणीच (देवही) रक्षण करूं शकत नाही हे कसे?) या प्रश्नाचे उत्तर मिळाले पण ‘हे गुरू त्रयमूर्ति कसे झाले?’ या प्रश्नाचे ‘नरदेहाने लीला करीत आहेत’ असे संकेतात्मक उत्तर मिळाल्याने अधिक स्पष्टीकरणाच्या अपेक्षेने नामधारक विचारीत आहे. ‘ज्याला आपण परब्रह्म असे म्हणतां अशा ह्या त्रिमूर्ति भगवंताने मानवासारखा पृथ्वीतलावर कसा जन्म घेतला? ते मला ऐकायचे आहे तरी (कृपा करून मला) सांगा.’१. सिद्धमुनि त्याचे अभिनंदन करीत म्हणतात, ‘धन्य आहेस. तुझ्यावर (गुरूंचा) अनुग्रह झाला आहे. तुझ्या मनांत संसारपाशांतून सोडवणारी भगवद्भक्ती उद्भवली आहे हे पाहून मला अतीव आनंद झाला आहे.’२. ‘(खरोखर) ह्या भूमीवर विचरत असतां मला कुणीही गुरूच्या कथा विचारीत नाही. तुझ्यासारख़्या भक्तरूपी चंद्राच्या दर्शनाने माझा ज्ञानसागर उचंबळून आला आहे.’३.

**अनन्ताः सन्त्यनन्तस्य लीलाः प्रश्नमृतेपि ताः । न वक्तुर्यान्ति निजधी-परिणामावधिं स्मृतिम् ।।४।।**
**कलौ तु नास्तिका मर्त्यास्तत्कथाश्रवणात्मकम् । प्लवं तर्तुं भवाब्धिं नो विदुर्मज्जन्त्यतोऽत्र ते ।।५।।**
**यत्राम्बुवित्तु तृष्णोर्मिर्ग्रहाः कामादयो ध्वनिः । भोगोऽपारेऽत्र नौस्त्वेषा गुरुर्नेता कृपामरुत् ।।६।।**

अनन्तस्य लीलाः अनन्ताः सन्ति। निज+धी+परिणाम+अवधिं वक्तुं ताः अपि प्रश्नं ऋते स्मृतिं न यान्ति।४। कलौ तु नास्तिकाः मर्त्याः भवाब्धिं तर्तुं तत्+कथा+श्रवण+आत्मकं प्लवं नो विदुः। अतः ते अत्र मज्जन्ति।५। यत्र अवित् तु अम्बुः, तृष्णा ऊर्मिः, कामादयः ग्रहाः, भोगो ध्वनिः। अत्र अपारे तु एषा नौ, गुरुः नेता, कृपा मरुत्।६।

'अनंत अशा भगवंताच्या लीला अनंत आहेत. आपल्या बुद्धीच्या मर्यादानुसार त्या आठवल्या तरी कुणी तरी प्रश्न केल्याशिवाय त्या सांगितल्या जात नाहीत.'४. या कलियुगातील नास्तिक मानवांना भवसागरातून तारणारी गुरुकथाश्रवणरूपी नौका माहीत नसल्याने ते ह्या संसारसागरांत बुडत असतात.'५.

**भवसागर -** ज्या भवसागरांत, अज्ञान हेच पाणी आहे, आशांच्या उंच उंच लाटा आहेत, कामक्रोधादि षड्रिपु ह्याच सुसरी आहेत, सुखदुःखांच्या भोगाने प्रस्फुटणारे हर्षशोकाचे ध्वनि हेच त्या सागराचे गाज आहेत. ह्या अपार भवाब्धीत ही गुरुकथा नावेसारखी आहे, गुरूच सारंग आहेत आणि त्यांची कृपा हाच अनुकूल वारा आहे. भगवत्पूज्यपादाचार्यांनी (ऐतरेय उपनिषदातील १:२:१ या मंत्रातील *'अस्मिन्महत्यर्णवे'* या पदावरील भाष्यांत) असे रूपक केले आहे. 'अविद्या, काम आणि कर्म यांच्यायोगे झालेले प्रचंड दुःख हेच पाणी; तीव्र व्याधी, जरा आणि मृत्यू ह्याच सुसरी-मगरी; विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणाऱ्या सुखालेशाचा क्षणभंगुर विसावा सोडल्यास पांचही इंद्रियांच्या तृष्णारूपी वायूने क्षोभविलेल्या शेकडो अनर्थांच्या प्रचंड लाटा; महारौरवादि अनेक नरकातील जीवांच्या हाहाःकाराच्या आक्रोशातून घुमणारा कल्लोळ; असा हा अनादि, अनंत, अपार, निराधार संसारसागर! इथे सत्य, आर्जव, दान, दया, अहिंसा, शम, दम, धृति इत्यादि आत्मगुणांच्या शिदोरीने भरलेली ज्ञानरूपी नौका आहे; सत्संग आणि सर्वत्याग हाच मार्ग आहे आणि मोक्ष हे तीर आहे.'६.

**तस्माद्दिष्ट्या साधनानि प्राप्तान्यत्राप्ययत्नतः । तरिष्यसि भवाब्धिं स्रागतो वक्ष्ये कथाः श्रृणु ।।७।।**
**इत्युक्त्वाऽमरजाभीमासङ्गमे ह्युपविश्य सः । गुर्वधिष्ठितकल्पद्रु-मूलेऽस्मै प्राह सत्कथाः ।।८।।**
**मुमुक्षुभेषजं मुक्त-जीवनं विषयीष्टदं । श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वाद्वच्मि तेऽल्पकम् ।।९।।**

तस्मात् दिष्ट्या अत्र अयत्नतः अपि साधनानि प्राप्तानि। भवाब्धिं स्राक् तरिष्यसि। अतः कथाः वक्ष्ये। शृणु।७। इति उक्त्वा सः अमरजा+भीमा+सङ्गमे गुरु+अधिष्ठित+कल्प+द्रु+मूले हि उपविश्य अस्मै सत्कथाः प्राह।८। श्रीगुरोः चरितं मुमुक्षु+भेषजं मुक्त+जीवनं विषयी+इष्टदं वाक्+हृत्+दूरत्वात् ते अल्पकं वच्मि।९।

त्याप्रमाणे सद्भाग्याने सद्गुरुभेट आणि गुरुकथाश्रवण ही साधने अनायासे तुला इथे लाभली आहेत. तू शीघ्रच भवसागर तरून जाशील. तरी मी कथा (गुरुचरित्र) सांगतो ती तू ऐक.'७. असे बोलून ते सिद्ध मुनि भीमा आणि अमरजा संगमावर श्रीगुरू नरसिंहसरस्वतींनी स्थापिलेल्या कल्पवृक्षाच्या तळवटी बसून ह्या शिष्यत्वाने अंगीकारलेल्या नामधारकाला गुरुचरित्रातील सुंदर कथा (किंवा सत् म्हणजे भगवंत त्याच्या कथा - भगवत्कथा) सांगू लागले. श्रीगुरूंनी स्थापल्याने त्या अश्वत्थाला कल्पवृक्षत्व आले आहे. शिवाय त्या वृक्षांत मनोकामना पूर्ण करण्याचा गुण आहे हे पुढे १९व्या अध्यायात स्पष्ट केले आहेच. ('ह्या अक्षय्य पुण्यदायक वृक्षाला पुत्रादि कामना पुरविण्यास वेळ लागत नाही.'(४५) 'तरी हे साध्वि, तू त्याची विधिवत् पूजा कर; तो शीघ्र फल देणारा आहे.'(४८).८.

**श्रीगुरुचरित्राची थोरवी -** ह्या मृत्युलोकात विषयासक्त, मुमुक्षु आणि मुक्त असे तीन प्रकारचे लोक आहेत. त्या तिघांनाही हे श्रीगुरूंच्या चरित्राचे वाचन कसे लाभदायक आहे ते सांगतात. विषयी लोकांच्या कामना ह्याच्या पठणाने अथवा श्रवणाने पूर्ण होतात; तर मुमुक्षूंसाठी ते संसाररूपी व्याधीपासून सोडविणारे औषध आहे; मुक्तांना निरुपम आनंदाचा ठेवा असल्याने जीवनभूत आहे; तसेच 'वेदांत, गुरु आणि ईश्वर या त्रयीचे आजीवन सेवन करावे. आधी ज्ञानप्राप्तीसाठी आणि (ज्ञानप्राप्ती)नंतर कृतघ्नतादोष लागू नये यासाठी', (तत्त्वोपदेश - ८६)

**जगत्येकार्णवीभूते शेषतल्पश्रितोऽस्पृहः । नारायणो जगत्स्रष्टुं मायामुद्भाव्य सोऽण्डजम् ।।१०।।**
**स्रष्टारं व्यसृजत्सृष्ट्यै सप्तर्षीन् सोऽपि मानसान् । तत्रैकोऽत्रिस्तपस्वीशो यस्याभूद्भगवान्सुतः ।।११।।**

जगति एक+अर्णवी+भूते शेष+तल्प+श्रितः अस्पृहः नारायणः मायां उद्भाव्य सः अण्डजं स्रष्टारं व्यसृजत्। सः अपि मानसान् सप्तर्षीन् (असृजत्)। तत्र एकः तपस्वी अत्रिः यस्य ईशः भगवान् सुतः अभूत्।१०-११।

या वचनानुसार कृतघ्नता दोषाचा परिहार करून जीवन सफल करणारे आहे. गुरुचरित्रांत वेदांत, गुरू आणि ईश्वर या तिन्हींचेही प्रतिपादन आहे. हे गुरुचरित्र *'यतो वाचो निवर्तन्ते'* ह्या श्रुतीप्रमाणे (तै.उ. २:४), वाणीच्या आणि मनाच्याही अतीत आहे. तरी मी माझ्या बुद्धीप्रमाणे थोडेसे तुला सांगतो.९.

दुसऱ्या परार्धाच्या अंती ब्रह्मदेवाच्या दिनांतीं जो नैमित्तिक प्रलय होतो त्यावेळी सर्व जग जलमय झाल्याने एक समुद्रच राहतो. अशा त्या जलांतही शिल्लक असलेला जो शेष त्याचीच शय्या करून निष्काम असा नारायण ('नर' म्हणजे मानव; त्याच्यापासून झालेली तत्त्वे म्हणजे 'नार'; तीच ज्याचे *'अयन'* प्राप्तीचे उपाय आहेत. किंवा *'नार'* म्हणजे मानवसमुदाय हेच ज्याचे निवासस्थान आहेत तो (मनुस्मृति १:१०)) पहुडला असतां जगाची उत्पत्ती करण्यासाठी त्याने सदसद्विलक्षण अशी आपली अनिर्वाच्य प्रकृति निर्माण केली. जी खरी आहे किंवा नाही ह्याविषयी मानवी बुद्धीला निर्णय करतां येत नाही. निर्माण केली याचा या ठिकाणी अर्थ तिला आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) कार्यान्वित करून अंडापासून जन्मलेल्या ब्रह्मदेवाला जागे केले. (**उद्भाव्य** याचा अर्थ इथे जागे केले असा होतो. कारण हा नैमित्तिक प्रलय आहे जेव्हा ब्रह्मदेव झोपलेला असतो. प्राकृतिक प्रलयांती ब्रह्मदेवाचाही लय होत असल्याने त्या वेळी सृष्टीसाठी पुन्हां ब्रह्मदेवाची उत्पत्ति करावी लागते.) त्या जागलेल्या ब्रह्मदेवानेही मरीचि, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, पुलह, अंगिरस आणि दक्ष ह्या सप्तर्षींना आणि सनत्कुमार, सनक, सनन्दन, सनातन आणि नारद ह्या मानसपुत्रांना निर्माण केले. त्यांमध्ये अत्रि हा श्रेष्ठ तपस्वी होता, ज्याच्या पोटी भगवान श्रीदत्तप्रभूंनी जन्म घेतला.१०-११.

**ऋषेरत्रेस्तपोऽर्थस्य पातिव्रत्यविभूषिता । आसीद् भार्याऽनसूयाख्या त्रिलोक्यां विश्रुता सती ।।१२।।**
**जातोर्वी मृदुलार्काग्नी शीतौ मन्दो मरुद्भिया । तस्या देवाः पदापाय-भ्रान्त्याऽऽपुः शरणं हरिम् १३।।**
**एकदा नारदोऽप्येत्य तद्धर्मान्ब्रह्मविष्णवजान् । प्राब्रवीन्नेदृशी साध्वी सर्वदाऽभ्यागतप्रिया ।।१४।।**

तपः+अर्थस्य ऋषेः अत्रेः पातिव्रत्य+विभूषिता भार्या त्रिलोक्यां विश्रुतां सती आसीत्।१२। तस्या भिया ऊर्वी मृदुला, अर्क+अग्नी शीतौ, मरुत् मन्दः जाताः। देवाः पद+अपाय+भ्रान्त्या हरिं शरणं आपुः।१३। एकदा नारदः अपि ब्रह्म+विष्णु+अजान् एत्य तत् धर्मान् प्राब्रवीत्, 'सर्वदा अभ्यागत+प्रिया ईदृशी साध्वी न'।१४।

ईश्वराने सृष्टि उत्पन्न केल्याविषयी वेदवचने यापूर्वी (प्रथमाध्यायाच्या टीकेत) उद्धृत केली आहेत. इथे हे लक्षांत घ्यायला हवे की ईश्वराचे कर्तृत्व हे या वेदवाक्यांचे तात्पर्य नाही; तर ईश्वराच्या कर्तृत्वाचा निषेध करण्यासाठी आधी मायेचा विलास (सृष्टी) दाखविला आहे. आणि मग *'निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरञ्जनं'* (श्वेताश्वतर उ. ६:१९) *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०) *'नेह नानास्ति किञ्चन'* (कठ उ. २.४.११) *'यस्मिन्सर्वा..'* (ईशावास्य उ. ६) *'अतोऽन्यदार्त्तं'* (बृहदारण्यक उ. ३.४.२) अशा निषेधवाक्यांनी अद्वैताचा निरास केला आहे. यापेक्षा इथे विस्तार करीत नाही.

**अत्रि आणि अनसूया -** प्रस्तुत ग्रंथांत श्रीदत्तात्रेयांचे प्राधान्य असल्याने त्यांच्या अवताराचा उपोद्घात **ऋषेः** या श्लोकापासून केला आहे. ऋषी म्हणजे मंत्रदृष्टा. ऋग्वेद सर्वानुक्रमणीत सांगितल्याप्रमाणे अत्रि ऋषी ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलाचे द्रष्टे आहेत. 'सूर्याला राहूने अंधःकाराने झांकोळले असतां अत्रि ऋषींनीच त्याला सोडविले. इतर कुणालाही ते शक्य झाले नाही' असा अत्रि ऋषींच्या ज्ञानाचा गौरव ऋग्वेदात केला आहे (ऋ. ४.४०.९). तप हेच ज्याचे अर्थ म्हणजे सर्वस्व आहे अशा अत्रींची पत्नी अनसूया होती. नांवाप्रमाणेच जिच्यात असूयेचा लेशही नव्हता. 'रसाकर' नांवाच्या ग्रंथात, केसांत घालायची, देहावर घालायची, परिधान करायची आणि विलेपन करायची अशी चार प्रकारची आभूषणे सांगितली असली तरी अनसूयेचे पातिव्रत्य हेच एकमेव भूषण होते हाच विशेष! तीनही लोकांत तिच्या पातिव्रत्याची ख्याति होती.

**इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य विषीदन्त्य उपस्थिताः । तद्देव्योऽसहमाना द्राग्बभूवुर्मूर्छिता भृशम् ।।१५।।**
**पतिव्रतामानिनीस्ताः सावित्रीश्रीश्वरीस्त्रयः । आश्वास्यातिथिवद्भूत्वा रोषाच्छम्भुं सतीं ययुः ।।१६।।**

इति ऋषेः वाक्यं आकर्ण्य उपस्थिताः तत्+देव्याः विषीदन्त्य द्राक् असहमाना भृशं मूर्छिता बभूवुः।१५। पतिव्रता+मानिनीः ताः त्रयः सवित्री+श्री+ईश्वरीः आश्वास्य (देवाः) अतिथिवत् भूत्वा रोषात् सतीं शम्भुं ययौ।१६।

'अत्रीची जशी अनसूया' असा तिचा दाखला वेदमंत्रांतही दिला आहे (ऋग्वेद परिशिष्ट).१२. 'ज्या परमात्म्याच्या धाकाने अग्नी, सूर्य, इंद्र, वायु, मृत्यू हे पाचही आपापली कार्ये करतात' (कठ उ. २.३.४) तोच धर्माचा आधार आहे. (*'एष सेतुर्विधरण'* बृ.उ. ४.४.२२) असा धर्मरूपी परमात्माच अनसूयेने आपल्या आचरणात स्वाधिकाराने संपूर्णतः धारण केल्याने, पृथ्वी त्या सतीला दुखवू नये म्हणून मृदु झाली, अग्नी आणि सूर्य शीतल झाले आणि वायुसुद्धा तिच्या भयाने मंद वाहू लागला. सर्वच देवतांना आपापल्या पदांपासून ही अनसूया भ्रष्ट तर करणार नाही ना असा धाक उत्पन्न झाला आणि ते भगवान विष्णूंना शरण गेले.१३. एकदा नारदमुनीनीसुद्धा त्या अनसूयेच्या पातिव्रत्य, आतिथ्य आदि धर्माचरणाचे वर्णन ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांच्यापुढे करून 'अशी सदैव अतिथींचा स्नेहाने सत्कार करणारी अनसूयेसारखी साध्वी कुणीच नाही' असे उद्गार काढले.१४. हे देवर्षींचे वचन ऐकतांच तिथे जवळच असलेल्या तिन्ही देवांच्या पत्नींचा 'विश्वात आम्हीच काय त्या पतिव्रता' असा अभिमान दुखावला आणि मत्सरामुळे झालेला संताप सहन न होऊन त्या मूर्छित झाल्या.१५. सावित्री, लक्ष्मी आणि पार्वती यांची ही अवस्था पाहून त्यांना आश्वासन देऊन ब्रह्मा-विष्णु-महेश त्वेषाने अतिथिवेष घेऊन अत्रिऋषींच्या आश्रमाला अनसूयेकडे आले. खरे तर आत्माराम ईश्वरांना अशी प्रवृत्ती होण्याचे कारणच नाही; पण स्त्रियांच्या बुद्धीने वागल्यास कसा अनर्थ होतो हे जणू जगात दाखविण्यासाठीच ते सतीच्या सत्त्वहरणाला प्रवृत्त झाले. किंवा 'अरोषात्' असा विग्रह करून स्त्रियांच्या समाधानासाठी ते निघाले तरी ते शांतपणेच 'पतिव्रता नारी ही तीर्थ आहे' ह्या स्मृतिवचनाच्या द्योतनासाठी निघाले.१६.

**पतिव्रतापि तान्दृष्ट्वा स्वाश्रमाभ्यागतान्सुरान् । प्रत्युद्गत्वा समानीय स्वासने संन्यवेशयत् ।।१७।।**

**वीजितान्कृतपच्छौचान्सूपविष्टान्जगौ सती । स्वागतं वोऽद्य किं कार्यं मुनिस्तु तपसे गतः ।।१८।।**

**त ऊचुः साध्वि नो विद्मस्तपःसक्तमना मुनिः । कदाऽऽयातीत्यतो देहि क्षुधितेभ्योऽन्नमाश्वलम् ।।१९।।**

**इति श्रुत्वा गिरस्तेषां तथेत्युक्त्वा गृहं गता । पात्राण्यासाद्य तेभ्योऽन्नं परिविष्टं न्यवेदयत् ।।२०।।**

पतिव्रता अपि तान् स्वाश्रम+अभ्यागतान् सुरान् दृष्ट्वा प्रत्युत्+गत्वा समानीय सु+आसने संन्यवेशयत्।१७। वीजितान् कृत+पत्+शौचान् सु+उपविष्टान् (तान्) सती जगौ। वः स्वागतम्। अद्य किं कार्यम्? मुनिः तु तपसे गतः।१८। ते ऊचुः। (हे) साध्वि मुनिः तपः+सक्त+मनाः नः विद्मः। कदा आयाति? अतो क्षुधितेभ्यः आशु अलं अन्नं देहि।१९। इति तेषां गिरः श्रुत्वा 'तथा' इति उक्त्वा गृहं गता पात्राणि आसाद्य तेभ्यः परिविष्टं अन्नं न्यवेदयत्।२०।

त्या सतीनेही त्या अतिथिवेषांतील देवांना पाहून त्यांना सामोरे जाऊन, सन्मानाने घरांत आणून आपापल्या सुशोभित आसनांवर बसविले. त्यांचे पाय धुवून ते स्वस्थ बसल्यावर त्यांना कुशलप्रश्न विचारून पंख्याने वारा घालीत ती बोलली, 'आपलं स्वागत असो! मुनिवर तर तपस्येला गेले आहेत. आपण आज आपले काय कार्य आहे ते मलाच सांगावे.' त्यावर ते देव म्हणाले, 'मन आणि इंद्रिये यांचे ऐकाग्र्य हेच परम तप सर्व धर्माहून श्रेष्ठ आहे; तोच परम धर्म आहे' (महाभारत १२.२५०.२) ह्या वचनानुसार बाह्य इंद्रिये आणि अंतःकरण यांचे समाधान (संतुलन) हे तपच ब्रह्मप्राप्तीचे द्वार आहे. ऋषिवर्यांना त्याची आवड आहे हेही आम्हाला माहिती आहे. तेव्हा ते कधी येतील काय सांगावे? आम्ही भुकेजलो आहोत. तरी तू आम्हांला लवकर (मुनींची वाट न पाहता) पुरेसं अन्न दे.'१९. हे त्यांचे बोलणे ऐकून 'ठीक आहे, जेवायला वाढते' असे म्हणून अनसूयेने स्वयंपाकघरांत जाऊन ताटांत अन्न वाढून आणले. त्यांच्यापुढे ताटे ठेवून पाणी फिरविले आणि त्यांना जेवायची विनंति केली.२०.

**त आहुः साध्वि नो देहि नग्ना भूत्वेत्यपेक्षितम् । नेदं चेद्रोचतेऽन्यत्र गच्छामः क्षुधिता इतः ।।२१।।**
**तच्छ्रुत्वापि प्रहस्यैषा ऋषेः सङ्गात्तपस्विनः । पूताया मम कामेन किं भवेच्चेत्तथाऽकृते ।।२२।।**
**शप्त्वा गच्छन्ति विमुखा महान्तोऽमी ममात्मजाः । इति स्वगतमुद्भाव्य तथेत्युक्त्वांशुकं जहौ ।।२३।।**

ते आहुः, '(हे) साध्वि, नः नग्ना भूत्वा देहि इति अपेक्षितम्। इदं न रोचते चेत् इतः क्षुधितः अन्यत्र गच्छामः।२१।' तत् श्रुत्वा अपि प्रहस्य 'तपस्विनः ऋषेः सङ्गात् पूताया मम कामेन किं भवेत्? तथा अकृते महान्ताः विमुखाः शप्त्वा गच्छन्ति। अमी मम आत्मजाः।' इति स्वगतं उद्भाव्य 'तथा' इति उक्त्वा अंशुकं जहौ।२२-२३।

त्यावर ते तिघे देव म्हणाले, 'हे सती, तू विवस्त्र होऊन आम्हांला (अन्न) वाढावेस अशी आमची इच्छा आहे. हे तुला रुचत नसेल तर आम्ही उपाशीच इथून निघून इतरत्र जाऊ.'२१. त्यावर अनसूया सती हे त्यांचे विपरीत बोलणे ऐकूनही हसली आणि मनातच विचार करू लागली, 'तपस्वी (अत्रि) मुनींच्या संगाने माझे अंतःकरण शुद्ध झाले आहे. मला कामविकाराचे काय भय?' पातिव्रत्याचा भंग करणारा कसलाही विचारच माझ्या मनात येऊ शकत नाही असा तिला आत्मविश्वास होता. अतिथिसत्काराच्या इच्छेनेसुद्धा परपुरुषासमोर नग्नावस्थेत वावरणे हे प्रायचित्ताला कारण ठरू शकेल अशीही शंका नको. *'कामोऽकार्षीत् कामः करोति नाहं करोमि, कामः कर्ता नाहं कर्ता, कामः कारयिता नाहं कारयिता'* (नारायणोपनिषत् ६१) हा मंत्र विवेकी लोकांना कामविकाराचा आत्म्याशी कांहीच संबंध नाही हेच शिकवतो; अविवेकी लोकांसाठी मात्र प्रायश्चित्ताला उपयुक्त ठरतो. तेव्हा मला कामाची काय भीती? ह्याउलट मी जर ह्यांच्या सांगण्यानुसार वागले नाही तर आम्हांला शाप देऊन हे महात्मे निघून जातील. तेव्हां *'स इद्भोज'* या मंत्रांच्या (ऋग्वेद १०.११७.३) अतिथींचा सत्कार करण्याने इष्टफल आणि न करण्याने अनिष्ट फलप्राप्तीच्या अन्वय आणि व्यतिरेकाने केलेल्या प्रतिपादनानुसार आपण ह्यांच्या मनाप्रमाणे करावे असा मनोमन निश्चय करून त्या सतीने अंगावरील वस्त्र काढून टाकले.२३.

**तदैव तेऽभवन्बाला निर्विकारा अपीश्वराः । जगत्सृडीश्वरहराः पातिव्रत्यप्रभावतः ।।२४।।**
**तान्सा तथाविधान्प्रेक्ष्य सचित्राभूद्धृतांशुका । पयः प्रसूत्या इवास्यास्तदालं स्तनतोऽस्रवत् ।।२५।।**
**सपद्येवाद्भुताविष्टा प्रेम्णा हृष्टतनूरुहा । प्रत्येकं पाययामास क्षीरं तेऽपि पपुर्मुदा ।।२६।।**
**जगदुत्पत्तिकरण-सुश्रान्त इव विश्वसृट् । पीत्वा पतिव्रतास्तन्यं परमां शान्तिमाययौ ।।२७।।**
**विश्वम्भरो विश्वरक्षा-क्रियात्रस्त इवामलम् । पतिव्रतापयः प्राश्य पीनां विश्रान्तिमाविशत् ।।२८।।**

तदा एव ते ईश्वराः जगत्+सृट्+ईश्वर+हराः अपि पातिव्रत्य+प्रभावतः निर्विकाराः बालाः अभवन्।२४। सा तान् तथाविधान् प्रेक्ष्य सचित्रा धृत+अंशुका अभूत्। तदा अस्याः स्तनतः प्रसूत्याः इव अलं पयं अस्रवत्।२५। सपदि एव अद्भुत+आविष्टा हृष्ट+तनू+रुहा प्रेम्णा प्रत्येकं क्षीरं पाययामास। ते अपि मुदा पपुः।२६। विश्व+सृट् जगत्+उत्पत्ति+करण+सुश्रान्त इव पतिव्रता+स्तन्यं पीत्वा परमां शान्तिं आययौ।२७। विश्वं+भरः विश्व+रक्षा+क्रिया+त्रस्त इव पतिव्रता+पयं अलं प्राश्य पीनां विश्रान्तिं आविशत्।२८।

तत्क्षणीच जगाची उत्पत्ति करणारा ब्रह्मदेव, नियंता विष्णू आणि संहर्ता शंकर ह्या तिघाही ईश्वरांची पातिव्रत्याच्या प्रभावाने निरागस बाळे झाली.२४. ती पतिव्रता त्या अतिथींची अशी बाळे झालेली पाहून आश्चर्यचकित झाली आणि आपली सोडलेली वस्त्रे परत नेसली. त्या वेळी नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीप्रमाणे तिच्या स्तनांतून दूधाच्या धारा सुरू झाल्या.२५. लगेच त्या आश्चर्याने थक्क झालेल्या अनसूयेला प्रेमाचे भरते आले आणि तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. एकेका बाळाला अंगावर घेऊन ती पाजायला लागली. ती बाळेही अत्यंत आनंदाने दूध पिऊ लागली.२६. जगाच्या उत्पत्तिकार्याने (जणू) थकून गेलेल्या ब्रह्मदेवाला ते पतिव्रतेचे दूध पिऊन परम शांतीचा अनुभव आला.२७. विश्वंभर विष्णू सतत विश्वाचा सांभाळ करून (जसा काही) त्रस्त झाला होता. पतिव्रतेचे दूध पोटभर पिऊन त्याला विश्रांती मिळाली.२८.

**हरस्तु विश्वसंहार-कर्मतष्ट इव क्षणात् । सत्यौधस्याशनात्तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ ।।२९।।**
**स्वधर्मज्ञाततत्सत्त्वा पाययित्वाऽपि तान्पयः । सा जगौ तत्कथोद्घातं प्रेम्णा विन्यस्य पालके ।।३०।।**
**अत्रान्तरे वनादेत्य श्रुतगीतः सतीमुखात् । सर्वं श्रुत्वेश्वरान्ज्ञात्वा ध्यानान्नत्वाऽस्तुवन्मुनिः ।।३१।।**
**विश्वसर्गस्थितिप्रान्त-निदानं विश्वसाक्षिणम् । विष्णुं विश्वमयं वन्दे विश्वाद्यं विश्वसंग्रहम् ।।३२।।**

हरः तु विश्व+संहार+कर्म+तष्ट इव सती+औधस्य+अशनात् क्षणात् तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ।२९। स्वधर्म+ज्ञात+तत्+सत्त्वा अपि तान् पयः पाययित्वा प्रेम्णा पालके विन्यस्य सा तत्+कथा+उद्घातं जगौ।३०। अत्र+अन्तरे मुनिः वनात् एत्य, सती+मुखात् सर्वं श्रुत्वा ध्यानात् ईश्वरान् ज्ञात्वा नत्वा अस्तुवन्।३१। विश्व+सर्ग+स्थिति+प्रान्त+निदानं विश्व+साक्षिणं विश्व+मयं विश्व+आद्यं विष्णुं वन्दे।३२।

विश्वसंहाराच्या कर्माने जणू रोडावलेल्या रुद्राला सतीचे स्तन्य (उधस् म्हणजे स्तन त्यापासून झालेले ते औधस्य) पिऊन पुष्टी आली आणि 'सुगंधिं पुष्टिवर्धनम्' (ऋग्वेद सं. ७.५९.१२) ह्या रुद्रमंत्रानुसार इतरांचीही पुष्टी वाढविण्याचे सामर्थ्यही त्यांच्यात आले.२९. आपल्या पातिव्रत्यधर्माच्या प्रभावाने त्या बालकांचे ईश्वरत्व जाणून, ती अनसूया त्यांना दूध पाजून, पाळण्यात घालून भक्तिप्रेमाने त्यांच्या कथा गाऊ लागली.३०. थोड्या वेळाने (आह्निक पूर्ण करून) वनाहून आलेल्या अत्रि ऋषींनी आपल्या पत्नीचे गायन ऐकले आणि तिच्याच मुखाने सर्व हकीकतही ऐकली. मग त्यांनी ध्यानाच्या प्रभावाने त्या भगवंतांना ओळखले आणि त्यांची स्तुती केली.३१. 'रजोगुणाच्या प्रादुर्भवाने विश्वाची उत्पत्ती (**सर्ग**), सत्त्वगुणाने **स्थिति** (दुष्टांचे दमन आणि साधूंचे रक्षण) आणि तमोगुणाने प्रलय (**प्रान्त**) ह्या सर्वांचे अभिन्ननिमित्तोपादानरूप आदिकारण (**निदान**) आपण आहां. विश्वाच्या आंत *'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा'* (याच्यावांचून कोणी दुसरा पहाणारा नाही) या वेदोक्तीप्रमाणे (बृ.उ. ३.७.२३) साक्षित्वाने राहूनही निर्लिप्त आहां.' *'सु'* चांगली *'पर्णं'* गति किंवा परस्पर सहाय ज्यांचे आहे असे *'सयुजौ'* सारखे *'सखायौ'* सखे *'द्वा'* दोन पक्षी, जीव आणि ईश्वर,

**तपस्तप्तं यदर्थं स त्वमेकोऽपीश लीलया । त्रिधा भूत्वात्मनात्मानं स्वैर्गुणै रमयस्युत ।।३३।।**

(हे) ईश यत्+अर्थं तपः तप्तं सः त्वं एकः अपि लीलया स्वैः गुणैः त्रिधा भूत्वा आत्मना आत्मानं रमयसि उत।३३।

*'समानं'* एकाच *'वृक्षं'* वृक्षावर ('ओव्रू छेदने' ह्या धातूपासून तत्त्वज्ञानाने छेदण्यास योग्य,) भगवद्गीतेच्या १५व्या अध्यायातील रूपकानुसार शरीराला *'परिषस्वजाते'* बिलगलेले, वसलेले आहेत. *'तयोः'* त्यांच्यापैकी *'एकः'* जीव *'स्वादु'* (कडू)गोड *'पिप्पलं'* कर्मफळे *'अत्ति'* खातो, भोगतो म्हणून (कर्म)बंधनांत सांपडतो. *'अन्यः'* दुसरा ईश्वर मात्र *'अनश्नन्नभिचाकशीति'* न खातां (चांगल्या वाईट कर्मफलांचा भोग न घेतां) केवळ साक्षित्वाने पहात असतो. (ऋग्वेद १.१६४.२०) 'असा जर मी आहे तर मग मी परिच्छिन्न आहे का?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात **विष्णुं** व्यापनशील अर्थात् सर्वव्यापी, देश, काल, वस्तु या सर्व परिच्छेदांपासून मुक्त आहां. 'असे असेल तर माझ्याहून वेगळ्या अशा या जगाची गति काय?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात, विश्वरूपी अध्यासाचा विवर्त या न्यायाने आपण विश्वाचे आद्य कारण असून आपल्यापासून वेगळे अस्तित्त्वच त्याला नाही; त्यामुळे आपण **विश्वमय** आहात. सर्प, माला, जलधारा, काठी इत्यादि भासमान रूपांना केवळ एका दोरीहून अन्य काही वास्तवता नसते त्याप्रमाणे नामरूपात्मक जगताचे आपणच एकमेव वास्तव आहांत (ऐतरेयारण्यक २.४.१). अशा आपल्याला वन्दन असो.३२. ज्या परमात्म्याच्या दर्शनासाठी मी तप आचरले तो तू एकच भगवंत लीलेने, स्वनिर्मित सत्त्व, रज आणि तम या गुणांचा अंगीकार करून ब्रह्मा, विष्णू आणि शंकर अशी तीन रूपे धारण करून आपणच आपल्याशी खेळत असतोस.३३.

**अध्यारोपापवादाभ्यां समुद्भूतं जगत्ततः । अहंममाभिमानेन पार्थक्यं त्वस्य नापरम् ।।३४।।**

जगत् अधि+आरोप+अप+वादाभ्यां समुद्भूतम्। ततः अहं+मम+अभिमानेन तु अस्य पार्थक्यं, न अपरम्।३४।

**अध्यारोप आणि अपवाद -** तुझ्या या अविकृत स्वरूपापासूनच अध्यारोपाने - अध्यासाने, जगताची सृष्टी होते. आणि त्या अध्यासाच्या अपवादाने - निराकरणाने, तो जगदाभास लय पावतो. जसा अंधारात पडलेल्या दोरीवर सापाचा **अध्यारोप** होतो आणि दिवा लावून तो संभ्रम दूर केला की तो साप नाश पावतो तसेच हे आहे. ईश्वरसृष्टीत परमात्म्याच्या मायेकडे दृष्टिक्षेपणाने - ईक्षणाने, ह्या प्रक्रियेला आरंभ होतो आणि सोळा (पांच भूते आणि अकरा इंद्रिये) अंशांच्या जड विश्वात त्याच्या प्रवेशाने ती प्रक्रिया पूर्ण होते. जीवसृष्टीत हीच प्रक्रिया जाग्रत अवस्थेपासून सुरू होऊन आत्मज्ञानाने पूर्ण होते. अशा रीतीने भासमान होणाऱ्या जगतातील देहादिक उपाधीसंबंधी 'मी' असा अभिमान, घरदार, पत्नी, पुत्र, धन पशू इत्यादिकांविषयी 'माझे' असा अभिमान हेच आपल्या अविकृत स्वरूपात भेदाचा **(पार्थक्याचा)** आभास निर्माण करतात. **तु** शब्दाने हा मिथ्या असल्याचे सूचित केले आहे. आत्मसाक्षात्काराने हे नामरूपात्मक द्वैत (**अपरं**) नाहीसे होते. देहात प्रविष्ट होऊन जन्म-मरण-जाग्रति-स्वप्न-सुषुप्तिरूप संसारचक्रांत फिरणारा जीव कधीकाळी परमेश्वराच्या कृपेने, गुरू आणि शास्त्र यांच्या प्रसादाने, हे सर्व अनुभवाला येणारे पांचभौतिक जग, त्यांतील प्राणिमात्र हे कुठून येतात, यांचे रक्षण कोण करतो आणि यांचा लय शेवटी कुठे होतो याविषयी विचार करतो. नाना शास्त्रे धुंडाळून (परोक्ष ज्ञान) हा सर्व संसार मायेने कल्पिलेला असून मिथ्या आहे असा तो निश्चय करतो. मग अपरोक्ष ज्ञानाने म्हणजेच आत्मानुभवाने ब्रह्म हेच परम सत्य आहे अशी अनुभूती घेतो. हाच **अपवाद** होय. त्यानेच परब्रह्मस्वरूप आपल्याहून वेगळे कांहीच नाही, एकच (परमात्मा) सर्वां ठायी पहावा, या जगात नानाविध असे कांही नाही अशी त्याची खात्री पटते (बृ.उ. ४:४:१९-२०). मग अशा ह्या एकमेवाद्वितीय ब्रह्माची तीन रूपे कशी झाली असे म्हणाल तर आधी सांगितल्याप्रमाणे केवळ स्वतःच्या मनोरंजनासाठी केलेली ती एक लीला आहे. माझ्याच घरी

**इति स्तुवति तस्मिंस्ते पालके बालरूपतः । स्थिता अप्याद्यरूपैः स्वैः स्थित्वोचुस्तं वरं वृणु ।।३५।।**
**स प्राह साध्वीं सुभगे ब्रह्मविष्णुमहेश्वराः । त्वद्भक्त्याप्ता मनोदूरा अतोऽभीष्टं वरं वृणु ।।३६।।**

इति तस्मिन् स्तुवति ते बाल+रूपतः पालके स्थिता अपि स्वैः आद्य+रूपैः स्थित्वा ऊचुः,'वरं वृणु'।३५। सः प्राह, '(हे) साध्वि, सुभगे, त्वत्+भक्त्या मनो+दूराः ब्रह्म+विष्णु+महेश्वराः आप्ताः। अतः अभीष्टं वरं वृणु।'।३६।

का याचे उत्तरही पूर्वीच्या लोकांत मी केलेले तप असे आले आहेच. जगात आपली भक्तवशता प्रकट करण्यासाठी, माझ्या तपाचे निमित्त करून आपण अवतरला आहांत. वास्तविक आपला कुणी अन्य निर्माता नाही (**निमित्त कारण**) की इतर कशापासून (**उपादान**) आपली उत्पत्ती नाही. आपणच भगवद्गीतेत सांगितल्यानुसार (२:२०) जन्ममरणादि विकार आपल्याला स्पर्शू शकत नाहीत. केवळ भक्तांवर कृपा करण्यासाठीच आपण स्वेच्छेने अवतार धारण करता.३४.

याप्रमाणे अत्रि महर्षी स्तुति करीत असतांनाच, पाळण्यात बालरूपांनी तसेच राहून ते तीनही भगवंत आपल्या मूळ रूपांनी मुनींसमोर उभे राहिले; आणि त्यांना 'इष्ट वर मागून घ्या,' असे म्हणाले.३५. याप्रमाणे त्या त्रैलोक्यवंदित देवांना आपल्यासमोर उपस्थित होऊन असे बोलतांना ऋषिवर्यांनी 'हा अनसूयेच्या पातिव्रत्याचाच प्रभाव आहे,' असा विचार करून ते त्या सतीला म्हणाले, 'हे सौभाग्यवती (ईश्वरांचे मातृत्व तिला प्राप्त झाल्याने हे संबोधन आहे), मनाला सुद्धा दुर्गम असे ब्रह्मा-विष्णू-महेश तुझ्या भक्तीने आपल्या घरी आले आहेत. (हे पार्था, तो परमपुरुष केवळ अनन्य भक्तीनेच लाभतो ह्या वचनानुसार (भ.गी. ८:२२) भक्तीच मुख्य कारण आहे.) तरी तू तुला हवा असलेला वर मागून घे.'३६.

**साऽप्याह सुतपः सृष्ट्यै त्रिधाभूतेन वै भवान् । सृष्टोऽमुनामुमेवातः पुत्रत्वेन वृणोत्वजम् ॥३७॥**
**ऋषिः सोऽपीदमेवेष्टं मत्वा वव्रे तदेव हि । विष्णुः सर्वात्मनाऽहं ते मया दत्तः किलाब्रवीत् ॥३८॥**
**पतिव्रताप्रभावोऽयं बाला भूत्वेश्वराः स्थिताः । स्वस्वप्राग्रूपतोऽप्येते स्वं स्वं स्थानं ययुस्त्रयः ॥३९॥**

सा अपि आह, '(हे) सुतप, त्रिधा+भूतेन अमुना सृष्ट्यै वै भवान् सृष्टः। अतः अमुं अजं एव पुत्रत्वेन वृणोतु'।३७। सः ऋषिः अपि इदं एव इष्टं मत्वा तत् एव हि वव्रे। विष्णुः अब्रवीत्, 'अहं सर्व+आत्मनः मया ते दत्तं किल'।३८। अयं पतिव्रता+प्रभावः। ईश्वराः बालाः भूत्वा स्थिताः अपि एते त्रयः स्व+स्व+प्राक्+रूपतः स्वं स्वं स्थानं ययुः।३९।

हे महर्षींचे वचन ऐकून 'हा खरोखर आपल्या पतीच्या तपाचाच प्रभाव आहे, माझी भक्ती आणि पातिव्रत्य यांचे काय महत्त्व?' असा विचार करून ती नम्रपणे बोलली, 'हे श्रेष्ठ तपस्विन्! (अत्रिमुनींचे तप ईश्वरोद्देशाने आणि सात्त्विकतेने केलेले असल्याने त्यांत कसलाही दोष (किल्मिष) नसल्याने इथे त्याला सुंदर (सात्त्विक) तप असे म्हटले आहे.) तीन रूपे धारण करणाऱ्या या परमेश्वरानेच आपल्याला प्रजोत्पादनासाठी निर्माण केले आहे. तरी जन्मादि भावातीत त्रयमूर्ति भगवंतालाच आपण पुत्ररूपाने मागून घ्यावे.' पुत्र हा गौण आत्माच असल्याने त्या रूपाने अवतरलेल्या भगवंताच्या कोड-कौतुक, आलिंगन-चुंबन इत्यादींनी मुख्य आत्म्याची प्राप्ती सुलभ व्हावी हाच त्या साध्वीचा भाव होता.३७. ऋष् म्हणजे गती. ज्याची अतीत (भूत), अनागत (भविष्य) आणि वर्तमान ह्या सर्व काळांत गती आहे, जो हे सर्व जाणूं शकतो तो **ऋषी**. अशा त्या अत्रि ऋषींनाही हे आपल्या पत्नीचे म्हणणे पटले आणि त्याप्रमाणे त्यांनी तोच वर (तीनही देवांनी आपले पुत्र व्हावे असा) मागून घेतला. त्यावर त्या सर्वव्यापी भगवंताने 'मी माझे स्वतःचे पूर्णत्वाने तुला दान करतो,' अशा शब्दात ते मान्य केले.३८. अशा रीतीने ते ब्रह्मा-विष्णू-महेश बालकांच्या रूपाने अनसूयेच्या पाळण्यात राहून आपल्या मूळ रूपांनी आपापल्या स्थानी - अनुक्रमे सत्यलोक, वैकुंठ आणि कैलास या लोकांना निघून गेले.३९.

**पृथङ्नामानि बालेभ्यो ददौ तेभ्योऽर्थविन्मुनिः । पूर्णत्वेन मयाऽहं ते दत्त इत्युक्तवान् स्वयम् ।।४०।।**
**भगवानिति नाम्नैनं मुनिर्दत्तं चकार सः । ब्रह्मांशं चन्दनाच्चन्द्रमौग्रं दुर्वाससन्तथा ।।४१।।**
**त्रयाणामप्ययं साक्षाद्दत्तस्तु भगवान्स्वयम् । श्रुत्यन्विष्टाङ्घ्र्यब्जरेणुः सच्चिदानन्दविग्रहः ।।४२।।**
**सदेष्टयोगसंविद्दः स्मर्तृगामी क्षणे क्षणे । चण्डोऽप्यन्योऽनुग्रहाशीश्चन्द्रो जननवर्धनः ।।४३।।**

अर्थ+वित् मुनिः तेभ्यः बालेभ्यः पृथक् नामानि ददौ। स्वयं भगवान्, 'अहं मया पूर्णत्वेन ते दत्तं' इति उक्तवान्।४०। एनं मुनिः नाम्ना दत्तं चकार। सः ब्रह्म+अंशं चन्दनात् चन्द्र तथा औग्रं दुर्वाससम् (नाम्ना चकार)।४१। त्रयाणां अपि दत्तः तु स्वयं श्रुति+अन्विष्ट+अङ्घ्रि+अब्ज+रेणुः सत्+चित्+आनन्द+विग्रहः साक्षात् स्वयं भगवान्।४२। सदा इष्ट+योग+संवित्+दः क्षणे क्षणे स्मर्तृगामी। अन्यः चण्डः अपि अनुग्रह+आशीः। चन्द्रः जनन+वर्धनः।४३।

नंतर शब्दांचे अर्थ जाणणाऱ्या त्या अत्रिमुनींनी त्या बालकांना त्यांच्या त्यांच्या गुणांची द्योतक अशी नावे दिली. 'मी सर्वांशाने तुला दिले आहे **(दत्तम्)**' असे म्हणणाऱ्या विष्णूंच्या अंशाला त्यांनी **दत्त** असेच नाव दिले. '*दत्तात्मा तु स्वयं दत्त*' असे याज्ञवल्क्यस्मृतीचे वचन आहे (व्यवहाराध्याय श्लोक १३१). अशीच शुनःशेपाला विश्वामित्राने दत्तक घेतल्याची गोष्ट आहे. पण तिथे शुनःशेपाचा पहिला जनक पिता होता त्यामुळे त्याला *'कृत्रिम वैश्वामित्र'* असे म्हणतात. हे दोन पित्यांचे *'द्व्यामुष्यायण'* दत्ताच्या ठिकाणी लागू होत नाही. कारण भगवान विष्णूंचा आधी कुणी पिता नव्हता. तसेच गोत्रप्रवरादि अस्तित्वातच नव्हते. ब्रह्मादेवाच्या अंशाला त्याच्या आल्हादकतेमुळे **(चंदन)** चंद्र असे नामाभिधान केले. तसेच उग्रस्वभावाच्या भगवान शंकाराच्या अंशाला **दुर्वास** असे नाव दिले.४०-४१. ह्या तिघांतही स्वतः दत्त, ज्याच्या पदकमलाच्या परागकणांचा श्रुति निरंतर शोध घेताहेत (पण ज्याना ते अजून सांपडले नाहीत) असा सच्चिदानंदस्वरूप साक्षात् परमेश्वर आहे. पदकमलाचे परागकण या शब्दाने जगताच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा निर्देश आहे, हे परब्रहाचे *'तटस्थलक्षण'* आहे. सत्, चित् आणि आनंद यांनी परब्रह्माचे *'स्वरूपलक्षण'* सुचविले आहे. हा दत्त सदैव अभीष्ट, अष्टांगयोग आणि ज्ञान यांचा दाता आहे आणि स्मरताक्षणी दर्शन देणारा आहे. दुर्वासमुनि रागीट स्वभावाचे असले तरी इतरांवर अनुग्रह करण्याचाच त्यांचा स्वभाव आहे. आणि चंद्र वंशवर्धक तसाच लोकांचे पोषण करणारा आहे.४२-४३.

**दुर्वासःशापमाश्रुत्य भूदेवार्थमनन्तशः । धृत्वावतारान्कार्यान्ते लीलाकायान्जहात्यजः ।।४४।।**
**परानुग्रहकार्यार्थमवतीर्णः स्वयं किल । दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वान्नामुमत्यजत् ।।४५।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कुतो दुर्वाससा शप्तः शापोऽव्यक्ते कथं वद । लग्नः परावरेऽमुं मे संशयं छेत्तुमर्हसि ।।४६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्ताधीनतया त्वेष भगवान् भक्तिभावनः । अव्यक्तोऽप्यस्ति सुव्यक्तः पूर्णाऽतोऽत्र सहिष्णुता ।।४७।।**

दुर्वासः शापं आश्रुत्य, अजः भू+देव+अर्थं अनन्तशः अवतारान् धृत्वा कार्य+अन्ते लीला+कायान् जहाति। पर+अनुग्रह+कार्य+अर्थं स्वयं किल अवतीर्णः। दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वात् अमुं न अत्यजत्।४४-४५। नामधारक उवाच। कुतो दुर्वाससा शप्तः? अव्यक्ते परावरे शापः कथं लग्नः? अमुं मे संशयं छेत्तुं अर्हसि।४६। एष भक्ति+भावनः भगवान् भक्त+अधीनतया अव्यक्तः अपि सुव्यक्तः अस्ति। अतः अत्र पूर्णा सहिष्णुता।४७।

दुर्वासमुनींच्या शापाचा अंगीकार करून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठी आणि देवांच्या कार्यासाठी हा अजन्मा अपरिमित अवतार धारण करतो आणि ती ती कार्ये झाल्यावर त्या त्या लीलाविग्रहांचे विसर्जन करतो. मात्र इतरांच्या अनुग्रहासाठी - मुमुक्षूंना मोक्षाची वाट दाखविण्यासाठी, भगवान विष्णूंनी स्वतः धारण केलेल्या ह्या दत्तावताराचे कार्य मात्र नित्य - न संपणारे असल्याने तो चिन्मय देह मात्र त्यांनी टाकलेला नाही.४४-४५. नामधारक प्रश्न करतात की 'ह्या कोणत्याही लक्षणानी अभिव्यक्तीला न येणाऱ्या आणि ब्रह्मादिकसुद्धा ज्याच्याहून निकृष्ट आहेत अशा परमात्म्याला दुर्वासांचा शाप लागला कसा हा माझा संशय आपणच फेडूं शकतां.'४६. सिद्ध म्हणाले, 'हा भगवान भक्तांच्या अधीन आहे. त्यामुळे वस्तुतः अव्यक्त असलेला हा भगवंत दया, क्षमा, शांती इत्यादि सर्व लक्षणे धारण करून व्यक्त होतो. त्यामुळेच भक्तवात्सल्याने त्याच्यात पूर्ण सहिष्णुता असते. भक्तांचे सर्व अपराध तो पोटात घेतो. प्रसंगी भक्ताचे क्लेश स्वतःवर घेतो पण त्यांना त्यांची झळ लागूं देत नाही.'४७.

**पुराम्बरीषनामैको भक्तो भागवतोत्तमः । एकादशीव्रतपर आसीदभ्यागतार्चकः ।।४८।।**
**एकदा व्रतभङ्गाय पारणाहे तदालयम् । चण्डः प्राप्याह दुर्वासा भोजनं मेऽर्पयेति च ।।४९।।**
**दास्यामीत्युक्तवत्यस्मिन्गत्वा स्नातुं नदीमरम् । छिद्रान्वेषी तत्र तस्थौ तरितुं पारणाक्षणम् ।।५०।।**
**सोऽप्यभुक्ते मुनौ भोज्यं नान्यथा व्रतभङ्गभीः । तीर्थात्तूभयसिद्धिर्मे इति मत्वा पपौ जलम् ।।५१।।**

पुरा अम्बरीष नाम एकः भागवत+उत्तमः एकादशी+व्रत+पर अभ्यागत+अर्चकः आसीत्।४८। एकदा चण्डः दुर्वासा पारणा+अहे व्रत+भङ्गाय तत्+आलये प्राप्य च आह, 'मे भोजनं अर्पय' इति।४९। अस्मिन् 'दास्यामि' इति उक्तवत् स्नातुं अरं नदीं गत्वा छिद्र+अन्वेषी तत्र पारणा+क्षणं तरितुं तस्थौ।५०। सः, 'मुनौ अभुक्ते न भोज्यं, अन्यथा व्रत+भङ्ग+भीः, तीर्थात् तु मे उभय+सिद्धिः' इति मत्वा जलं पपौ।५१।

पूर्वी अम्बरीष नांवाचा एक राजर्षि उत्तम भागवत (भगवद्भक्त) होता. आपल्या अंतरांत आणि सर्व भूतमात्रांत भगवंताचे दर्शन करणारा आणि आपल्यासह सर्व चराचर भगवंताच्या ठायीं आहे असे पाहणारा भागवतोत्तम होय. (*'सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः। भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः।।'* श्रीमद्भागवत ११:२:४५) तो निष्ठेने एकादशीव्रत करीत असे. दशमीला एकभुक्त राहून संकल्प करायचा, एकादशीला पूर्ण दिवसभर उपोषण करायचे आणि द्वादशीला नियत वेळेला पारणा करून पुनः उरलेल्या दिवसभर उपोषण करायचे असे ते व्रत. असे तीन दिवसांचे व्रत तो करीत असे. तसाच त्याचा घरी आलेल्या अतिथीला जेवण घालण्याचाही नियम होता.४८. एकदा त्याच्या व्रताचा भंग करण्याच्या हेतूने संतापी दुर्वासमुनी द्वादशीच्या दिवशी पारण्याला मुहूर्तभर (दिवसाचा ३०वा भाग; ४८ मिनिटे) असतांना आले आणि त्यांनी भोजनाची मागणी केली.४९. अम्बरीषाने ते मान्य केल्यावर ते स्नानासाठी नदीवर गेले. तिथे मुद्दामच पारण्याची वेळ टळावी ह्या हेतूनेच अंबरीषाच्या व्रतातील न्यून (छिद्र) शोधणाऱ्या ऋषींनी हत्तीप्रमाणे स्नान करीत विलंब केला.५०. इकडे मुनींना सोडून जेवता येत नाही आणि पारण्याचा मुहूर्तही चुकूं नये अशा शृंगापत्तीत सांपडलेल्या अंबरीषाने फक्त तीर्थजल प्राशन केले.५१.

**तदैत्याह मुनिः पीतं हित्वा मां क्षुधितं यतः। दुर्भगानेन दोषेण भ्रमिष्यसि भवे भवे ।।५२।।**
**इत्युक्तः सोऽप्यजं भीतो दध्यौ स्वकुलदैवतम् । स्वदासजीवनं विष्णुं सोप्यागत्याह तं मुनिम् ।।५३।।**
**मुने मोघं न ते वाक्यं शापं देहि तमेव मे । नायं सोढुं प्रभुर्भक्त-वात्सल्यान्मे सहिष्णुता ।।५४।।**

तदा मुनिः एत्य आह, '(हे) दुर्भग यतः मां क्षुधितं हित्वा पीतं, अनेन दोषेण भवे भवे भ्रमिष्यसि।'।५२। इति उक्तः सः अपि भीतः स्वकुलदैवतं अजं दध्यौ। स्वदासजीवनं विष्णुः सः अपि आगत्य तं मुनिं आह।५३। '(हे) मुने ते वाक्यं मोघं न। तं एव शापं मे देहि। अयं न सोढुं, मे भक्त+वात्सल्यात् सहिष्णुता।'।५४।

त्याच वेळी नदीहून परतलेल्या मुनींनी ते ओळखून त्याला शाप दिला. 'अरे करंट्या, मला उपाशी ठेवून जेवलास त्या पापाने तू पुनःपुन्हा विविध योनीत (मत्स्य, कूर्म, वराह, सिंह इत्यादि) जन्म घेऊन फिरत राहशील.' इथे कठोपनिषदातील मंत्राचा (१.१.८) निर्देश महाराजांनी केला आहे. ज्याच्या घरून ब्राह्मण उपाशी जातो असा दुर्बुद्ध, आपल्या आशा-अपेक्षा, सत्संग आणि आनंद, इष्टपूर्तादि पुण्यांचे फळ या सर्वांना मुकतो. यासाठी कोणत्याही परिस्थितीत अतिथीची उपेक्षा करू नये हाच या मंत्राचा भावार्थ आहे.५२. ह्या शापाने आता आपण पशुयोनीत गेल्याने आपल्याला भगवंताचे स्मरण राहणार नाही ह्या भयाने कासावीस झालेल्या त्या भागवतोत्तमाने आपले कुलदैवत भगवान विष्णू यांचे ध्यान केले. श्रीहरीही तत्क्षणी तिथे प्रकट झाले आणि दुर्वास ऋषींना म्हणाले,५३. 'ऋषि महाराज, आपल्या तपाच्या सामर्थ्याने आणि आपण सत्यसंकल्प असल्याने आपले वचन कधीच वाया जाणार नाही. पण हा एवढा भयंकर शाप ह्या माझ्या भक्ताला सोसणार नाही. अहो, हा तर मलाही सहन करणे दुरापास्त आहे; पण भक्तवात्सल्याने मी तो सोशीन. तेव्हां आपण तो शाप मलाच द्यावा.'५४.

**इत्याकर्ण्य मुनिर्मत्वा भुव्ययं दुर्लभो नृणाम् । अम्बरीषप्रभावेण शापसम्बन्धकारणात् ।।५५।।**
**भविष्यत्यत्र सुलभस्तच्छपाम्येनमित्यसौ । तं शशापाप्यजः शापाद् बहुधावतरत्यजः ।।५६।।**

इति आकर्ण्य मुनिः 'अयं भुवि नृणां दुर्लभः। अम्बरीष+प्रभावेण शाप+संबन्ध+कारणात् अत्र सुलभः भविष्यति। तत् एनं शपामि।' इति मत्वा असौ तं शशाप। अजः शापात् बहुधा अवतरति।५५-५६।

हे ऐकून दुर्वासांनी 'हा भूलोकातील मानवांना तपादि कठीण उपायांनीसुद्धा भेटत नाही. अंबरीषाच्या भक्तीसाठी आणि शापाच्या निमित्ताने हा ह्या भूलोकी सुलभ होईल. तरी मी यालाच हा शाप देतो,' असा विचार करून भगवंताला शाप दिला. आणि जन्मादि विकारांच्या अतीत असूनही नारायणाने मत्स्य, कूर्म इत्यादि रूपांनी पृथ्वीवर अवतार धारण केले.

विष्णूचे मत्स्यादि अवतार पुराणांतून वर्णिलेले आहेत.

१. चैत्र शुक्ल तृतीयेच्या अपराह्ण (माध्याह्नोत्तर) काळी मत्स्य रूपाने अवतरून समुद्रात बुडलेले वेद वर काढून मनूचे रक्षण केले.

२. वैशाखी पौर्णिमेला सायंकाळी कासवाचे रूप घेऊन समुद्रमंथनासाठी मंदार पर्वत पाठीवर घेतला. ३.

भाद्रपद शुक्ल तृतीयेच्या अपराह्णी वराहरूपाने समुद्रांतून पृथ्वी वर काढून हिरण्याक्षाचा संहार केला.

४. वैशाख शुक्ल चतुर्दशीला नरसिंहरूपाने अवतरून हिरण्यकश्यपूचा नाश केला.

५. भाद्रपद शुद्ध द्वादशीला माध्याह्नकाली वामनाचे रूप घेऊन कपटाने असुरराज बलीचे बंधन केले.

**अस्यावतारा मत्स्याद्याः पुराणोक्ता हि विश्रुताः । द्विवारमाविरासीत्स दीनान्त्रातुं जनान् कलौ ।।५७।।**
**अद्यापि तौ कामदौ स्तः पामरागोचरौ कलौ । यतकालकलौ द्राक्शं सिद्ध्येन्नान्यदतोऽवितः ।।५८।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

अस्य मत्स्य आदि पुराण+उक्ताः अवताराः हि विश्रुताः। कलौ दीनान् जनान् त्रातुं द्विवारं आविरासीत्।५७। कलौ पामर+अगोचरौ तौ कामदौ अद्यापि स्तः। यत+काल+कलौ शं द्राक् सिद्ध्येत् न अन्यत्। अतः (सः कलिः।) अवितः।५८।

६. वैशाख शुक्ल तृतीयेच्या माध्याह्नकाली कार्तवीर्यादि क्षत्रियांचा संहार करण्यासाठी परशुराम भार्गवाचा अवतार घेतला.

७. चैत्र शुक्ल नवमीला दशरथाच्या पोटी रामाचा अवतार घेऊन रावणाचा कुळासहित नाश केला. ८.

श्रावण कृष्ण अष्टमीला मध्यरात्री अवतरून श्रीकृष्णाने भूमीचा भार हलका केला. ९. आश्विन शुक्ल दशमीला बुद्धाचा अवतार घेऊन कारुण्याचा प्रसार केला. १०. श्रावण शुक्ल षष्ठीला कल्कीचा जन्म होईल आणि तो म्लेच्छांचा नाश करील. हे दहा अवतार होत.५५-५६. कलियुगांत झालेल्या अवतारांविषयी पुढच्या श्लोकांत सांगितले आहे.

मार्गशीर्ष पौर्णिमेला प्रदोषकाळी बुधवारी मृगनक्षत्रावर श्रीदत्तात्रेयांचा अवतार आजही गाजतो आहे. ह्या दत्तप्रभूंचेच श्रीपाद आणि नरहरि या नांवांचे दोन अवतार कलियुगांतील दीनदुबळ्यांच्या उद्धारासाठी झाले आहेत. पामरांना दिसत नसले तरी ते आजही ते भक्तांच्या कामना पूर्ण करीत विद्यमान आहेत.

(तर मग ते सकल दोषांनी भरलेल्या या क्रूर कलीचा नाश का करीत नाहीत ही शंका अपेक्षून सांगत आहेत.)

ब्रह्मदेवाच्या योजनेने त्याला नेमून दिलेल्या काळाचा विचार करून आणि त्या युगांत पुण्याचा लाभ सुलभ आणि लवकर (केवळ संकल्पाने) होत असल्याने तसेच संकल्पाने पाप मात्र लागत नसल्याने तो कितीही दुष्ट असला तरी त्याला राखला आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तिसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अध्याय ४ ।।

## ।। यदुरुवाच ।।

**श्र्यायुःकीर्त्यृद्धिहेतुर्ना न्नर्थसक्तोऽन्यथा भवान् । कल्पः स्वङ्गो ज्ञोऽप्यकर्ता कुतोऽत्रातृट् समुत्विति ।।१।।**

ना श्री+आयुः+कीर्ति+ऋद्धि+हेतुः नृ+अर्थ+सक्तः। भवान् अन्यथा। कल्पः सु+अङ्गः ज्ञः अपि अकर्ता, अतृट्, अत्र कुतः समुत् इति।१।

(श्रीगुरुचरित्राला अभिप्रेत दत्तसंप्रदायाची मूलतत्त्वे विस्ताराने मांडून त्याची सांगड श्रीमद्‌भागवत संप्रदायाशी घालण्याचे कार्यही श्रीस्वामिमहाराजांनी प्रस्तुत ग्रंथाद्वारे केले आहे. त्यासाठी आवश्यक तेथे श्रीगुरुचरित्रात नसलेल्या विषयांचा समावेश त्यांनी ह्या द्विसाहस्री गुरुचरितम् ग्रंथात केला आहे. अर्थात् हे विषय आगंतुक आहेत ही जाणीव असल्याने त्या त्या ठिकाणी त्या लोकांना त्यांनी 'क्षेपक' म्हटले आहे. हा संपूर्ण चौथा अध्याय मूळ गुरुचरित्रात नाही. त्यामुळे त्यांनी त्याला क्षेपकोऽध्यायः असे म्हटले आहे. मूळ गुरुचरित्रात श्रीदत्तजन्माची कथा सोडून इतर दत्तचरित्राचा फारसा उल्लेख आढळत नाही. श्रीगुरु नृसिंहसरस्वतींना त्रयमूर्ति असे विशेषण गुरुचरित्रात बऱ्याच ठिकाणी लावले आहे तेवढेच.

दत्तावताराच्या कार्याची, तत्त्वज्ञानाची आणि उपासनापद्धतीची संगती गुरुचरित्रातील प्रतिपादनाशी लावून त्याला बळकटी देण्याचे कार्य प.प. श्रीटेंबेस्वामिमहाराजांनीच प्रथम केले आहे. द्विसाहस्रीतील हा चौथा क्षेपक अध्याय त्या कार्याला पायाभूत आहे. ह्या अध्यायांतील ३ ते ४० हे ३८ लोक जसेच्या तसे श्रीदत्तपुराणात (६:५:९-४६) आणि श्रीदत्तात्रेयषोडषावतारचरित्रात (१५:८-४५) दिले आहेत. ह्या ३८ लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणाच्या टीकेत **'श्रीअवधूतगीता'** असे नांव दिले आहे. ह्या आख्यानावर श्रीमद्‌भागवतांतील एकादश स्कंधांतील ७व्या अध्यायातील यदु-अवधूत संवादाची छाप स्पष्टपणे दिसून येते. - अनुवादक)

**श्रीदत्तो यदुना पृष्टस्तं पुंसां श्रेयसेऽब्रवीत् । परं ध्युपाश्रितगुरु-शिक्षितज्ञानमात्मनः ।।२।।**

श्रीदत्तः यदुना पृष्टः तं पुंसां श्रेयसे आत्मनः परं धी+उपाश्रित+गुरु+शिक्षित+ज्ञानं अब्रवीत्।२।

श्रीगणेशाय नमः। चतुर्थाध्याय. आत्मविद्येचे निरूपण करण्यासाठी त्याला पुष्टी देणारे असे ब्रह्मज्ञानाचे उपदेशात्मक उपाख्यान ह्या अध्यायात सांगितले आहे. हे ब्रह्मसूत्रातील पारिप्लवाधिकरणाला (११:४:२३) अनुसरूनच आहे. उपनिषदांत याज्ञवल्क्य-मैत्रेयी, प्रतर्दन, जनश्रुति इत्यादींच्या अनेक कथा (उपाख्याने) सांगितल्या आहेत. ह्यासंबधी कुणी असे म्हणेल की ह्या अश्वमेधादि यज्ञात ऋत्विजांनी यजमानाला मधूनमधून कांही कथा सांगण्याचे विधान आहे. ह्या कथा केवळ त्या विधीचा भाग म्हणजे उपचारात्मक असतात. त्याला परिप्लव म्हणतात. त्याचप्रमाणे उपनिषदात आलेल्या ह्या गोष्टी औपचारिक मानायच्या काय? असा प्रश्न (पूर्वपक्ष) उपस्थित करून ह्या अधिकरणात त्याचे नकारार्थी उत्तर दिले आहे. पुढे असे स्पष्ट केले आहे की या कथा आत्मविद्येच्या प्रतिपादनाशी संबंधित असून त्याचा अंगभूत घटक आहेत. श्रीस्वामिमहाराजांना इथे हे सुचवायचे आहे की यदु आणि अवधूत यांची ही कथाही ह्या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय जो आत्मज्ञान त्याचाच परिपोष करीत आहेत. पर्यायाने श्रीगुरुचरित्रात आलेल्या सर्वच गोष्टी आत्मज्ञानाच्या उपदेशाचाच भाग आहेत असे सुचविले आहे. त्यांच्याकडे केवळ कांही प्रसंगोपात्त कथा असे न पाहता त्यांतील निर्दिष्ट तत्त्वज्ञानाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. **चोवीस गुरूंकडून शिकलेले ज्ञान। यदुराया अवधूत निरूपी जाण। तेवींच प्रल्हाद आणि अर्जुन। बोधिले अनसूयानंदने।।४।।** पित्याच्या शापाने वडिलोपार्जित राज्यापासून वंचित झालेला ययातिपुत्र यदु विरक्त होऊन वनांत संचार करीत असतां त्याने एका निर्मनुष्य स्थानी एका सर्वसंगपरित्याग केलेल्या, एका ब्राह्मण अवधूताला भूमीवर झोपलेले पाहिले. तिथे निश्चिंत, भयरहित आणि तरीही सावध (अंतर्मुख) अशा त्या अवधूताला पाहून यदुने आश्चर्याने त्याला प्रश्न केला.

**न दैवानुगभूतार्तः क्षमेव धीरः सृतेश्चलेत् । सदा परार्थोद्भवेहो नगाच्छिक्षेत्परात्मताम् ।।३।।**

दैव+अनुग+भूत+आर्तः क्षमा+इव धीरः सृतेः न चलेत्। पर+अर्थ+उद्भवः नगात् परात्मतां शिक्षेत्।३।

'महाराज! साधारणतः मानवाची प्रवृत्ती संपत्ती, आयुष्य, कीर्ती यांच्या समृद्धीसाठी धर्म, अर्थ, काम आदि पुरुषार्थाकडे असते. आपल्याला मात्र ह्या कशाचीही इच्छा दिसत नाही. तसेच आपण धर्मादि पुरुषार्थाविषयी उदासीन आहां. आपण धडधाकट, ज्ञानी आणि हुषार दिसता. तेव्हा आपल्यात कर्तृत्वच नाही असेही नाही. आपण निरिच्छपणे, पत्नी, पुत्र इत्यादि कांहीच संसार नसूनही पूर्ण आनंदात इथे पहुडलेले दिसतां. हे कसे काय?'

ययातिपुत्र यदूचा हा प्रन ऐकून श्रीदत्तप्रभूंनी आपल्याच बुद्धीने स्वीकारलेल्या चोवीस गुरूंपासून प्राप्त केलेले हेय आणि उपादेय - म्हणजेच त्याज्य आणि ग्राह्य असे दोन्ही प्रकारचे भ्रम आणि प्रमाद यांचा निरास करणारे उत्कृष्ट ज्ञान मानवांच्या उद्धारासाठी सांगायला आरंभ केला. *'सन्ति मे गुरवो राजन् बहवो बद्ध्युपाश्रिताः। यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु।।'* (भा.पु. ११:७:३२)

**१. पृथ्वी -** त्यांतही तितिक्षेचे परमार्थमार्गातील प्राधान्य लक्षात घेऊन आधी पृथ्वीपासून घेतलेली शिकवण सांगतात. आपापल्या कर्माला अनुसरून पृथ्वीवर वावरणारे जीव तिच्यावर सतत आघात करीत असतात; खणणे, नांगरणे, मलमूत्रादि विसर्जणे, पायाने तुडविणे इत्यादि नानाप्रकारे तिला सतत हे सर्व प्राणीमात्र त्रस्त करीत असतात. पण पृथ्वी मात्र त्या सर्वांना आधार देत आपल्या मार्गावर अविचल राहते. 'हे सर्व जीव आपापल्या दैवाप्रमाणे घडलेले आहेत आणि त्याचप्रमाणे ते वागतात. तेव्हां कुणाला काय म्हणून दोष द्यावा?' असा विचार ती करते. पृथ्वीपासून हे धैर्य आणि क्षमाशीलता मी शिकलो आहे. शास्त्रांत तीन प्रकारचे प्रारब्ध सांगितले आहे. स्वेच्छा प्रारब्ध, परेच्छा प्रारब्ध आणि अनिच्छा प्रारब्ध. यापैकी कोणत्याही प्रकारे समोर येणारे प्रारब्ध हे आपलेच कर्म आहे असा विचार करून कुणावरही राग धरू नये.

**प्राणवृत्त्याक्षिप्तहृद्वाग्विद्भृत्तुष्येन्न गोप्रियैः । तद्भुग्दोषगुणास्पृग्वि-धर्मासक्तच देहगः ।।४।।**

वित्+भृत् प्राणवृत्त्या अक्षिप्त+हृत्+वाक् तुष्येत्, न गो+प्रियैः। देह+गः तत्+भुक् वि+धर्म+असक्तः दोष+गुण+अस्पृक् गुण+आश्रयः स्वदृक्, गन्धैः वायुवत् गुणैः न युज्येत्।४।

**नग** पृथ्वीचेच अंगभूत असे जे पर्वत किंवा वृक्ष, त्यांच्यापासून इतरांच्या सुखासाठीच सर्वस्व वेंचायला मी शिकलो. **पर्वत** आणि वृक्ष यांची उत्पत्तीच जणू परोपकारासाठी झालेली असते. पर्वत आपली माती, जल, खनिज, रत्नादि संपत्ती इतरांसाठीच देतात. त्याचप्रमाणे **वृक्ष**ही त्यांना लावणारा, तोडणारा, अथवा उपटून टाकणारा असा जो कोणी त्यांचा आश्रय घेतो त्याला आपली पाने फुले, फळे, छाया आणि लाकूडसुद्धा निरपेक्षपणे अर्पण करतात. (जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयाने केली। दोघां एकचि साउली। वृक्ष दे जैसा।। ज्ञानेश्वरी १:१९९). *'भूतैराक्रम्यमाणोऽपि, धीरो दैववाशनुगैः। तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम्।। शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः। साधुः शिक्षेत भूभृत्तौ, नगशिष्यः परात्मताम्।।'* भा.पु. ११:७:३७-३८.

**२. वायू -** क्षमाशील मनुष्याला आंतरिक शांती लाभते हे खरे असले तरी मनाला विषयांची ओढ असेल तर ते बहिर्मुख होण्याचीच शक्यता आहे. चित्ताला अंतर्मुखता येण्यासाठी देहाच्या आंतील आणि बाहेरील वायूपासून घेतलेले विषयांसंबंधी अनासक्तीचे शिक्षण सांगतात. शरीरांतील प्राणवायू जसा चव-बेचव असा विचार न करता जे अन्न मिळेल त्यावर निर्वाह करतो त्याचप्रमाणे शहाण्या माणसानेही मिळेल त्या आहाराने समाधान मानून रुचीकडे लक्ष देऊं नये. जिभेचे चोचले पुरवण्याची धडपड करून मनाचा क्षोभ होऊ देऊ नये. प्राणवृत्तीचा अवलंब करून आहार घेतला नाही तर मनाला विकलता येईल आणि ज्ञान टिकवता येणार नाही; रुचीचा आग्रह धरला तर मन आणि वाचा अशांत होतील. (*'प्राणवृत्त्यैव संतुष्येन्मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः। ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः।।'* भा.पु. ११:७:३९।।)

**गुणाश्रयो गुणैर्युज्येत्र गन्धैर्वायुवत्स्वदृक् । कालोत्थगुणतेजोऽब्भू-मयभावास्पृगित्पुमान् ।।५।।**
**वायूत्थाब्दास्पृक्खवच्चान्तःस्थेनाभिदसङ्गती । भाव्ये सर्वान्वयव्याप्त्या ब्रह्मात्मत्वात्ततात्मनः ।।६।।**

पुमान् वायु+उत्थ+अब्द+अस्पृक् काल+उत्थ+गुण+तेजः+अप्+भूमय+अस्पृक ख+वत्। आत्मनः सर्व+अन्वय+व्याप्त्या ब्रह्म+आत्मत्वात् अन्तःस्थेन अभित्+असङ्गती भाव्ये।६।

बाह्य वायू जसा सर्वत्र संचार करीत असतां सुगंधी उपवनांतून वा दुर्गंधयुक्त उकिरड्यावरून, हिमाच्छादित पर्वतराजीवरून वा धगधगणाऱ्या आगीतून जात असता त्यांचे सुगंध-दुर्गंध, शीतलता-उष्णता हे विविध धर्म स्वतःला फार काळ चिकटू देत नाही, त्याचप्रमाणे योगी प्राप्त विषयांचा भोग घेऊनही त्यांच्याविषयी आसक्ती ठेवीत नाही. (*'विषयेश्वाविशन्योगी नानाधर्मेषु वर्ततः। गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत्।।'* भा.पु.११:७:४०।।)

ह्या स्थूल देहात राहून तेथे विषयांचा उपभोग घेतांना जरी तो योगी दिसला तरी गंधादीपासून अलिप्त असणाऱ्या वायूसारखा अनासक्त राहतो. *'पार्थिवेष्विव देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः। गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक्।।'* भा.पु. ११:७:४१. हे असे कसे होईल ह्या प्रनाचे उत्तर दिले आहे. **स्व** म्हणजे आत्मा त्याच्यावर दृष्टी (दृक्) लावून म्हणजे आत्मानुसंधानाने हे शक्य होते.

**३. आकाश -** अशा आत्मचिंतनशीलाचेही चित्त निर्विकार, व्यापक अशा आत्म्याचे ज्ञान नसेल तर स्वस्थ राहणार नाही. त्यासाठी आकाशापासून घेतलेला धडा श्लोकाच्या उत्तरार्धात सांगितला आहे. काळाने निर्माण केलेले वायू, तेज, जल यांच्या मिश्रणाने झालेल्या मेघांनी जसे आकाश लिप्त होत नाही तसा ज्ञानी पुरुषाला पंचीकृत भूतांपासून झालेल्या देहाच्या विकारांचा स्पर्शही होत नाही. *'तेजोऽब्वन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः। न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान्।।'* भा.पु. ११:७:४३.

**रस्यः स्निग्धः प्रकृत्याच्छो ज्ञोऽब्वद्धाम्ना पुनाति नॄन् ।**
**छन्नः स्पष्टोऽपि काम्यर्च्यः प्रागुदग्दात्रघं दहन् ।।७।।**
**क्वापि भुङ्क्ते तपस्तेजो-दीप्तोऽक्षोभ्योऽपरिग्रहः । मलास्पृक्सर्वभक्षोऽपि ज्ञोऽग्निवच्चेन्धसीयते ।।८।।**
**तत्तद्रूपः स्वमायोत्थोच्चासत्स्थेशोऽग्निहेतिवत् । कालान्नित्येऽपि दृश्येते नात्मभूतोद्भवक्षती ।।९।।**

रस्यः स्निग्धः प्रकृत्या अच्छः अप्+वत् ज्ञः नॄन् पुनाति। अग्निवत् छन्नः स्पष्टः अपि प्राक् उदक् दातृ+अघं दहन् कामी+अर्च्यः।७। अक्षोभ्यः अपरिग्रहः मल+अस्पृक् क्व अपि भुङ्क्ते। सर्व+भक्षः अपि ज्ञः तपः+तेजः+दीप्तः। इन्धसि इयते । स्व+माया+उत्थ+उच्च+असत्+स्थः ईशः च (तत्तत्रूपः इयते)। कालात् नित्ये अपि आत्म+भूत+उद्भव+क्षती न दृश्येते।८-९।

आणखी घटाकाश, मठाकाश इत्यादी वेगवेगळ्या स्वरूपांत भासले तरी आकाश सर्वव्यापी असल्याने घटादिकांनी ते भिन्न होत नाही किंवा त्यांच्याशी आकाशाचा संबंध नसतो. घटादिकांच्या फुटण्याने आकाशाला काहीच हानी पोंचत नाही. त्याचप्रमाणे देहस्थ प्रत्यगात्मा सर्वव्यापी असल्याने आणि ब्रह्मस्वरूपच असल्याने त्याचा देहादिकांशी संबंध नसतो किंवा त्यांच्यामुळे त्याचे भेदही होत नाहीत. श्रीस्वामिमहाराज आकाशाची व्यापकता माळेतील मण्यांत असलेल्या दोऱ्याच्या व्यापकतेपेक्षा वेगळी असल्याचे स्पष्ट करतात. दोरा मण्यापासून वेगळा करता येतो. आकाश मात्र वेगळे होत नाही. सर्व चराचरांना ते अंतर्बाह्य व्यापून असते. सर्व चराचरांच्या अंतर्बाह्य स्थित असून विच्छिन्न न होता, सर्वांशी समन्वय करूनही निर्लिप्त राहण्याची शिकवण आकाशाकडून घ्यावी हा अभिप्राय. *'अंतर्हितश्च स्थिरजङ्गमेषु ब्रह्मात्वभावेन समन्वयेन। व्याप्त्याऽवच्छेदमसङ्गमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत्।।'* भा.पु. ११:७:४२.

**४. उदक -** ज्ञानी जलाप्रमाणे, मधुर(भाषी), लाघवी आणि स्वभावतः स्वच्छ असतो. पाण्यासारखाच आपल्या दर्शनाने, स्पर्शाने आणि सेवनाने लोकांच्या काया आणि मने पवित्र करतो. *स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम्। मुनिः पुनत्यपां मित्रमीक्षोपस्पर्शकीर्तनैः।।'* भा.पु.११:७:४४. पुढील अडीच श्लोकात अग्नीपासून शिकलेले ज्ञान सांगतात.

**देहः कलावद्विकारी कालेनात्माब्जवद् ध्रुवः । भात्यात्मा तत्स्थद्व्यक्तौ न स्वस्थो बुध्यतेऽर्कवत् ॥१०॥**

देहः कालेन कला+वत् विकारी, आत्मा अब्ज+वत् ध्रुवः। अर्क+वत् आत्मा (स्थूल+बुद्ध्या) व्यक्तौ तत्स्थ+वत् भाति स्वस्थः न बुद्ध्यते।१०।

**५. अग्नि -** अग्नीसारखा योगी कधी गुप्त (राखेने झांकलेला) तर कधी स्पष्ट धगधगता, सकाम भक्तांची (होत्यांची) पूजा घेतो आणि दात्याची मागची-पुढची सगळी पापे जाळतो. *'क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्टः उपास्यः श्रेय इच्छिताम्। भुङ्क्ते सर्वत्र दातृणां दहन् प्रागुत्तराशुभम्॥'* भा.पु. ११:७:४६. अग्नीसारखाच सर्व भक्षण करूनही त्याला मळ (दोष) लागत नाही. तपाच्या तेजाने तो अग्नीसारखा प्रदीप्त असल्याने त्याला कोणत्याही कारणाने क्षोभ होत नाही. अग्नी जसा सर्व जाळून टाकून कांहीच शिल्लक ठेवीत नाही तसाच ज्ञानीही कशाचा संग्रह करीत नाही. अग्नी ज्या ज्या इंधनात प्रवेश करतो त्याचाच आकार घेतो. गोल लाकडाला जाळतांना तो गोल दिसतो तर चौकोनी ठोकळ्याला जाळतांना तो चौकोनी दिसेल. तसाच आत्मा आपल्याच मायेने निर्मिलेल्या देव, प्राणी, मनुष्य इत्यादी देहांत प्रविष्ट होऊन त्यांच्यासारखाच भासतो. पण त्याला स्वतःला कोणताही आकार नसतो. तसेच दिव्याची ज्योती नित्य नवी प्रकाशते आणि मालवते. असे असूनही तिची उत्पत्ती अथवा नाश स्थूल दृष्टीला दिसून येत नाही. ती सतत तेवतांनाच दिसते. तशीच सतत जन्मणाऱ्या आणि नष्ट होणाऱ्या नाशिवंत देहांची क्षणभंगुरता काळाच्या वेगाने माणसाला जाणवत नाही. *'स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः। प्रविष्ट ईयते तत्तत्सरूपोऽग्निरिवैन्धसि॥'* भा.पु. ११:७:४७. 'कालेन क्षोभवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ। नित्यावपि न दृयेते आत्मनोऽग्नेर्यथार्चिषाम्॥' भा.पु.११:७:४९.

**६ चंद्र -** जन्म, स्थिती, वाढ, परिणाम, झीज आणि नाश ह्या सहा विकार असलेल्या देहापासूनही आत्मा वेगळा आहे हे चंद्रापासून घेतलेले ज्ञान पहिल्या श्लोकार्धात सांगितले आहे. देह हा चंद्राच्या कलांप्रमाणे विकारशील आहे; आत्मा मात्र चंद्रासारखा अविकारी आहे. ज्योतिष्यशास्त्रानुसार सूर्य तेजाचा गोलक आहे तर ग्रह आणि नक्षत्रे जलाचे गोल आहेत.

**स्थूलबुद्ध्याऽर्कवद्गोभिर्-गा यथास्वं गुणैर्गुणान् । आदत्ते विसृजत्यत्र सदा योगी न युज्यते ।।११।।**

(स्थूलबुद्ध्या)। यथास्वं गोभिः गाः अर्कवत् योगी गुणैः गुणान् आदत्ते विसृजति सदा न युज्यते।११।

जलमय चंद्र आणि तेजोमय सूर्य जेव्हा एका नक्षत्रात असतात तेव्हा चंद्र सूर्याने झांकल्यामुळे डोळ्याना दिसत नाही. एका नक्षत्रापासून दुसऱ्या नक्षत्राला जायला चंद्राला साठ कला ओलांडाव्या सागतात तर सूर्याला तेरा दिवस आणि रात्री लागतात. म्हणजे (मानवाच्या दृष्टीने) चंद्राचा वेग सूर्याच्या १५ पट आहे. प्रतिपदेला सूर्याचा पंधरावा भागच चंद्राच्या जलांत प्रतिबिंबित होतो. पंधराव्या दिवशी चंद्र आणि सूर्य यांच्यातील अंतर १३ नक्षत्रांचे होते. म्हणजेच २७ नक्षत्रांच्या मंडलात चंद्र आणि सूर्य समांतर होऊन एकमेकांसमोर येतात. म्हणून त्या (पौर्णिमेच्या) दिवशी संपूर्ण सूर्याचे प्रतिबिंब, त्यावर पडलेल्या पृथ्वीच्या सांवलीसहित दिसते. अमावास्या धरून हे चक्र सोळा दिवसांचे होते आणि ह्या काळांत चंद्राचे प्रतिबिंब एकेका कलेने वाढते. अशा सोळा कला होतात. नंतर पुन्हा प्रतिपदेपासून चंद्र आणि सूर्य एकमेकांजवळ येतात आणि चंद्रात उमटणारे प्रतिबिंब एकेका कलेने कमी होत पुढच्या अमावास्येला दिसेनासे होते. ह्या सर्व प्रक्रियेत जलगोलक चंद्राचा आकार कमी-जास्ती होत नाही. तो विकार फक्त कलांचाच आहे. तसेच आत्म्याचे पण आहे. आत्मा देहस्थ भासत असला तरी देहाचे विकार त्याला स्पर्शत नाहीत. पुढच्या अर्ध्या श्लोकात सूर्यापासून काय शिकलो ते सांगतात. *'विसर्गाद्याः स्मशानान्ता भावा देहस्य नात्मनः। कलानामिव चन्द्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मनः।।४८।।'* भा.पु. ११:७:४८.

**७. सूर्य -** स्वतः भेदरहित असूनही तो स्वरूपात स्थित आहे हे न कळून अभिव्यक्त स्थूल देहात असल्यासारखा भासतो. जसा सूर्य स्वर्गात (आकाशात) अविचल असतो पण घागरीतील पाण्यात हलताना दिसतो तसा स्थूल देहाच्या विकारानी आत्मा विकृत झाल्यासारखा वाटतो. *'सूर्यो थिल्लरामाजी (डबक्यात) बिंबला। मूढ म्हणती थिल्लरी बुडाला। त्याचेनि कंपे कंपु मानिला। डहुळला म्हणता तो।।५१।। त्या थिल्लराते नातळतां। गगनीं अलिप्त जेवीं सविता। तैसीच योगियांची योग्यता। देहातीतता देहकर्मी।।५२।।'* ए. भागवत. अ. ७.

**नाऽतिस्नेहप्रसङ्गात्तो नश्येद्दीनः कपोतवत् । कश्चित्कपोतः कपोती क्रीडादौ चेरतुर्वने ।।१२।।**
**प्रेम्णाऽशङ्कं मिथोबद्धध्यक्षङ्गौ पाति स श्रमात् । तर्पयन्ती साऽसूतार्भांस्-तांस्तौ पुपुषतुर्मुदा ।।१३।।**

ना अति+स्नेह+प्रसंगात् दीनः कपोतवत् नश्येत्। कश्चित् कपोतः कपोती क्रीडा+आदौ प्रेम्णा अशङ्कं धी+अक्ष+अङ्गौ मिथः वने चेरतुः। सः श्रमात् तर्पयन्तीं कपोतीं पाति। सा अर्भान् असूत। तां तौ (च सः) मुदा पुपुषतुः।१२-१३।

योग्य वेळी सूर्य जसा आपल्या किरणांनी (***गोभिः***) पाणी (***गा***) शोषून घेतो आणि पावसाळ्यांत पुनः ते पाणी सोडतो, तसाच योगी त्या त्या वेळी इंद्रियांद्वारा (**गुणैः**) विषय (**गुणाः**) ग्रहण करतो आणि कालानुसार आणि पात्रानुसार ते विषय दुसऱ्यांना देतो. या दोन्ही क्रियांचा तो अभिमान बाळगीत नाही. *'गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विसृजति। न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपति।।'* भा.पु. ११:७:५०.

**८. कपोत-कपोती -** वरीलप्रमाणे देहातीततेचा अभ्यास केला तरी जर कोणाचाही अतिरिक्त स्नेह त्याच्या नाशालाच कारण होतो हे कपोतापासून घेतलेले हेयलक्षण शिक्षण चार श्लोकांत सांगतात. माणूस (**ना**) (स्त्रीपुत्रादिकांच्या) फारच प्रेमात अडकून त्यांचे कोड कौतुक करू जाईल तर तो पारव्यासारखा विवश होऊन नाश पावेल. एका वनात एक पारवा (कवडा) आणि त्याची मादी जोडीने आपली मने, दृष्टी आणि शरीरे (**धी, अक्षि, अंगौ**) एकमेकाशी गुंतवून (**मिथः**) निरतिशय प्रीतीने विहार करीत होते. हास्य, कटाक्ष आणि आलाप यांनी त्याला सुखविणाऱ्या त्या कपोतीला हवे ते कष्टाने देऊन तो कपोत तिचा सांभाळ करीत होता. यथाकाल त्या कपोतीने अंडी दिली आणि कालांतराने ती फुटून पिले बाहेर आली.

**कदाचिल्लुब्धको नीडाद् बहिःस्थांस्ताञ्छिचाददे । क्रोशन्तीं पतितां दुःखात्-तां तं चापस्मृतिं तथा ।।१४।।**
**द्वन्द्वारामः प्रियाऽशान्तो गृहासक्तो विवन्नरः । क्रान्तापावृतमुक्तिद्वार्-नृजन्मच्युत एव सः ।।१५।।**

कदाचित् लुब्धकः नीडात् बहिःस्थान् तान् शिचा आददे। तां दुःखात् पतितां तथा तं च अपस्मृतिं (लुब्धकः आददे)।१४।
द्वन्द्व+आरामः प्रिय+अशान्तः गृहा+आसक्तः नरः सः विवत् अपावृत+मुक्ति+द्वाः+नृ+जन्म+च्युत एव।१५।

त्यांच्यासाठी केलेल्या इवल्याशा घरटांत त्याना सुरक्षित ठेवून ते दोघे त्यांच्यासाठी चारा आणीत आणि त्यांच्या मुखांत घालीत. अशा रीतीने त्यांचे लालन-पालन होत असतांना ही पिले थोडी मोठी झाली आणि घरट्याच्या जवळपास खेळू लागली. आईवडील बाहेर चारा आणायला गेले असतांना याप्रमाणे तिथे खेळणारी पिले एका फांसेपारध्याने (**लुब्धकः**) टिपली. त्याने आपले जाळे (**शिचा**) लावून त्या पिलांना धरले आणि तो त्यांच्या मातापित्यांची वाट पाहू लागला. वनांतून परत आलेली कपोती, आपल्या पिलांची ती अवस्था पाहून दुःखातिशयाने चीत्कार करीत जाळ्यांत पडली. मागून येणाऱ्या कपोताने हे सर्व जाळ्यांत सांपडलेले पाहून हतबुद्ध आणि गलितगात्र झाला आणि त्यालाही त्या फांसेपारध्याने पकडले. (भागवतांत (११:७:५२-७३) हे कपोत-कपोतीचे गृहस्थाश्रमावरील रूपक अधिक विस्ताराने सांगितले आहे. एकनाथमहाराजांनीही ते सुंदररीत्या रंगविले आहे.)

असा दृष्टान्त मांडून झाल्यावर आतां तो दार्ष्टान्तिक जो पुरुष त्याला लावतात. द्वंद्वांत सुख शोधणारा, प्रिय विषयाच्या लालसेने अशान्त झालेला, घर हेच आनंदाचे धाम आहे अशा बुद्धीने त्यांत आसक्त झालेला पुरुष असाच काळाचे भक्ष्य होतो आणि जणू मुक्तीचे उघडे दार, असा हा दुर्लभ नरजन्म कुटुम्बपोषणातच व्यर्थ गमावून बसतो. परिणामी हीनतर योनीत जन्म घेतो असा भावार्थ. (*'एवं कुटुम्ब्यशान्तात्मा, द्वन्द्वारामः पतत्रिवत्। पुष्णन्कुटुम्बं कृपणः सानुबन्धोऽवसीदति।।७३।। यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम्। गृहेषु खगवत्सक्तस्तमारूढच्युतं विदुः।।७४।।'*
भा.पु. ११:७.)

**क्वाप्यस्त्यैन्द्रियसौख्यं तन्-नैच्छेदाजगरोऽक्रियः । यदृच्छयाप्तं महान्तं ग्रासं वाल्पं रसारसम् ।।१६।।**
**भक्षेच्चेन्नाप्तोऽनशनो दैवभुक्सर्पवत्स्वपन् । विनिद्रोऽक्रियबल्यङ्ग-धृग्गोमानपि नेहते ।।१७।।**

क्व अपि ऐन्द्रिय+सौख्यं आजगरः अक्रियः तत् न ऐच्छेत्। यदृच्छया आप्तं महान्तं वा अल्पं रस+अरसं ग्रासं भक्षेत्। न आप्तः चेत् अनशनः दैवभुक् स्वपन् विनिद्रः अक्रियः बली+अङ्ग+धृक् गो+मान् अपि न ईहते।१६-१७।

**९. अजगर -** हे समजून घेऊन अटळ प्रारब्ध कर्मानुसारच अर्थादिक सर्व प्राप्त होत असल्याने त्यासाठी व्यर्थ आयुष्य वायां दवडूं नये हा अजगरापासून शिकलेला धडा दोन श्लोकांत सांगितला आहे. इंद्रियांपासून होणारे सुख किंवा दुःख हे मनुष्य देहाप्रमाणेच पश्वादिक योनीत, नरकांत वा स्वर्गात कुठेही सारखेच असते. तेव्हां त्याचा सोस करण्यापेक्षां अजगराच्या वृत्तीने उदासीन राहावे. मग देहाचा निर्वाह कसा होईल असे म्हणाल तर आपल्या नशिबानुसार जो लहान, मोठा, कडू, गोड आहार कुणाची याचना न करता मिळेल तो घ्यावा. (*'ग्रासं सुमृष्टं विरसं, महान्तं स्तोकमेव वा। यदृच्छयैवाप्तं ग्रसेदाजगरोऽक्रियः।।'* भा.पु. ११:८:२.) तोही न मिळाला तर आहार दैवानेच मिळतो अशा निश्चयाने धीर धरून काकुळतीला न येतां उपाशीपोटी निजावे. *'जैसे न प्रार्थितां दुःख। प्राणी पावताती देख। तैसे न इच्छितां इन्द्रियसुख। भोगवी आवश्यक अदृष्ट।।'* ए.भा. ८:२१. बाह्यतः झोपूनही आपल्या हिताचा विचार जागा ठेवावा. ('स्वप्नजागृती मुकला। सुषुप्ती सांडोनि निजेला। शून्याचा पासोडा झाडिला। निर्जी पहुडला निजत्वें।।' ए.भा. ८:४०.) आवश्यक ते बळ असूनही इंद्रियांच्या चिथावणीला दाद न देतां निष्क्रिय अजगराप्रमाणे पडून राहावे. मग हळूहळू इंद्रियांचे पाहणे, ऐकणे इत्यादि व्यापार थांबून जातात. (*'ओजः सहोबलयुतं बिभ्रद्देहमकर्मकम्। शयानो वीतनिद्रश्च नेहतेन्द्रियवानपि।।'* भा.पु. ११:८:४.)

**पूर्णो हीनोऽप्यजपरो न सर्पति न शुष्यति । ज्ञोऽब्धिवत्सिन्धुभिर्निम्नोऽनन्तपारो दुरत्ययः ॥१८॥**
**सदाऽक्षोभ्यो दुर्विगाह्यः प्रसन्नः स्तिमिताब्धिवत् ।**

ज्ञः अब्धिवत् सिन्धुभिः पूर्णः न सर्पति, हीनः न शुष्यति। स्तिमित+अब्धिवत् निम्नः अनन्तपारः दुः+अत्ययः अक्षोभ्यः (भवेत्)।१८।

**१०. समुद्र -** अशी उदासीनवृत्ती धारण केल्यावरही दैववशात् मिळणाऱ्या भोगांचा हर्ष किंवा न मिळाल्याचा खेद न मानता समचित्त राहण्याची समुद्राची शिकवण पुढच्या दीड श्लोकांत सांगतात. समुद्र जसा पावसाळ्यांत भरभरून वाहणाऱ्या नद्या येऊन मिळाल्या तरी फुगत नाही, आपली मर्यादा सोडत नाही किंवा ग्रीष्माने नद्यांचे प्रवाह आटले तरी कोरडा पडत नाही, तसाच ज्ञानी इष्टांच्या संयोगाने उचंबळत नाही (***न सर्पति***) किंवा त्यांच्या वियोगाने शोकाने सुकत नाही (***न शुष्यति***). सागरासारखाच तो गहन, गंभीर (***निम्नः***) असतो. समुद्राचा जसा पार लागत नाही तसाच योग्याच्या चित्ताचाही थांग लागत नाही. समुद्र जसा चौफेर विस्तीर्ण असतो तसाच योगी देशकालाच्या मर्यादांनी सीमित नसतो. सागराला ओलांडणे जसे दुरापास्त आहे (***दुरत्यय***) तसेच ज्ञानी पुरुषाची आज्ञा देवादिकांनाही अनुल्लंघनीय असते. समुद्र जसा आपली मारवेलीची मर्यादा ओलांडीत नाही तसाच ज्ञानी रागादि विकारांपासून मुक्त असल्याने अविकारी (***अक्षोभ्यः***) असतो. समुद्रात प्रवेश करणे कुणालाही सहज शक्य नसते तसेच योग्याशी कुणालाही सहज सलगी करता येत नाही. तरीही शांत सागरासारखाच तो बाह्यतः प्रसन्न असतो. (*'मुनिः प्रसन्नगम्भीरो दुर्विगाह्यो दुरत्ययः। अनन्तपारो ह्यक्षोभ्यः स्तिमितोद इवार्णकः।। समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः। नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः।।'* भा.पु. ११८५-६.)

**११. पतंग -** 'कुरङ्गमातङ्गपतङ्गभृङ्गमीना हताः पञ्चभिरेव पञ्च। एकः प्रमादी कथं न हन्यते यः सेवते पञ्चभिरेव पञ्च।।' (हरीण, हत्ती, पतंग, भुंगा आणि मासा हे अनुक्रमे नाद, स्पर्श, रूप, गंध आणि स्वाद ह्या एकेका

**नाऽवशोऽग्नौ विवन्नश्येत् स्त्रीलीलारूपमोहतः ॥१९॥**
**गृण्हीयात्सर्वतः सारं रमेन्नैकत्र चाल्पभुक् । संग्रहे नाशबीजेऽपि मधुकृद्वन्मुनिः सदा ॥२०॥**

स्त्री+लीला+रूप+मोहितः ना अग्नौ विवत् नश्येत्।१९। अपि मधुकृत्+वत् अल्प+भुक् मुनिः सदा सर्वतः सारं गृह्णीयात् न एकत्र। नाश+बीजे संग्रहे अपि (न) रमेत्।२०।

विषयाच्या आसक्तीने नाश पावतात तर या पांचही विषयांचा स्वैर उपभोग घेणारा कसा वांचेल?) या गरुडपुराणातील (प्रेतकल्पखंड-धर्मकांड ११:१८) वचनाकडे दुर्लक्ष करून विषयांतच रमणारा नाश पावतो हे ह्या पांचाकडून घतलेले शिक्षण पुढच्या साडेचार श्लोकांत सांगत आहेत. दिव्याच्या ज्योतीच्या रूपाला भुललेला पतंग जसा आपण होऊन दिव्यावर झेप घालून मृत्युमुखी पडतो तसाच स्त्रियांच्या रूपाला, तिच्या हावभाव-कटाक्षांना भुललेला असंयमी पुरुष नरकात पडतो.

**१२. मधुकृत् (मधुकर) -** या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे फुलामध्ये शिरून त्यांतला मध ग्रहण करतो तो भुंगा आणि दुसरी आपल्या आहारासाठी मध करणारी मधमाशी! भुंगा जसा लहान मोठा सर्व फुलांचा रस घेत एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जात असतो तद्वतच साधूने अनेक शास्त्रे आणि अनेक गुरूंपासून सार घेत जावे. (***'बहुशास्त्रगुरूपासनेऽपि सारादानं षट्पदवत्', सांख्यदर्शन ४:४***). स्वादाच्या आसक्तीने भुंगा एकाच फुलात राहिला तर संध्याकाळी ते फूल मिटले तर त्यांत अडकून पडतो. तसाच साधक एकाच घरी आसक्त होऊन राहिला तर त्यांच्या मोहात सांपडण्याची शक्यता आहे. म्हणून परिमित आहार ठेवून साधकाने एका ठिकाणी रमूं नये. मधमाशी कष्टाने संग्रह करून मधाचे पोळे करते ते तिच्याच नाशाला कारणीभूत होते ह्यावरून हा धडा घ्यावा की संग्रहांत आपल्याही नाशाचे बीज आहे म्हणून संग्रह करू नये. (*'अणुभ्यच महद्भ्यच शास्त्रेभ्यः कुशलो नरः। सर्वतः सारमादद्यात्पुष्पेभ्य इव षट्पदः॥'* भा.पु. ११:८:१०. 'सायंतनं श्वस्तनं वा न सङ्गृहीत भिक्षुकः। मक्षिका इव सङ्गृह्णन्, सह तेन विनश्यति॥' भा.पु. ११:८:१२.)

**बध्येत नाऽङ्गनास्पर्शाच्-छूरैर्हन्येत वेभवत् । अन्योऽकात्सञ्चितं लुब्धैर्न भुक्तं नार्पितं धनम् ।।२१।।**
**भुङ्क्तेऽकार्जितगृह्यन्नं प्राग्भिक्षुर्मधुहेव च ।**

अङ्गना+स्पर्शात् बध्येत, वा इभ+वत् शूरैः हन्येत। लुब्धैः अकात्+सञ्चितं न भुक्तं न अर्पितं धनं मधुहा इव अन्यः भुङ्क्ते। अक+अर्जित+गृहीत+अन्नं प्राक् भिक्षुः (भुङ्क्ते)।२१।

**१३. हत्ती -** मादीच्या वासाने मस्त हत्ती आपल्यासाठी खणलेल्या गर्तेत सांपडतो आणि जन्माचा दास होऊन जातो. किंवा दुसऱ्या बलिष्ठ हत्तीकडून मारला जातो. म्हणून शहाण्या माणसाने स्त्रीस्पर्शापासून दूर रहावे. (*'पदाऽपि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि। स्पृशन्करीव बध्येत करिण्या अङ्गसङ्गतः।।'* भा.पु. ११:८:१३.)

**१४. मधुहा -** त्याग किंवा भोग न करतां केलेला द्रव्यसंग्रह आपला घातच करतो आणि आपण प्रयत्न न करतांही आपल्याला अन्नादि भोग प्राप्त होऊ शकतात हे मधमाशी आणि मध गोळा करणारा मधुहर यांच्यापासून घेतलेले शहाणपण सांगतात. एकाने कष्टाने संपादन केलेले धन त्याने स्वतः भोगले नाही किंवा इतरांनाही दान केले नाही तर मधमाशीच्या पोळ्यांतल्या मधाप्रमाणे दुसराच लुबाडतो. तसेच गृहस्थाने उद्योग करून मिळवलेले अन्न त्याच्या आधीच संन्यासी खाऊन जातो. (*'न देयं नोपभोग्यं च लुब्धैर्यद्दुःखसञ्चितम्। भुङ्क्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधुः।।'* भा.पु. ११:८:१४.)

**१५. हरीण -** अर्ध्या श्लोकांत हरिणाची शिकवण सांगितली आहे. ग्राम्य गीताच्या श्रवणाने (भक्तिसंगीताच्या नव्हे) पुरुष घंटानादाने भुललेल्या हरिणासारखा बंधनांत अडकतो. नृत्यादिक पाहिल्यानेसुद्धा हरिणीच्या पोटी जन्मलेल्या ऋष्यशृङ्गमुनीप्रमाणे माणूस वेडा होतो. (*'ग्राम्यगीतं न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित्। शिक्षेद्धरिणाद्बद्धान्मृगयोर्गीतमोहितात्।। नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम्। आसां क्रीडनको वश्य, ऋष्यशृङ्गो मृगीसुतः।।'* भा.पु. ११:८:१७-१८.)

**ना बध्येतैणवद्गीतान्-नृत्याद्वाप्यृष्यश्रृङ्गवत्      ।।२२।।**
**प्रमाथिजिह्वया नैति बडिशैर्मत्स्यवल्लयम् । जय्याल्पभुज्या साऽसक्त्या जितं सर्वं जिते रसे ।।२३।।**

गीतात् नृत्यात् वा ना ऐणवत् वा ऋष्यशृङ्गवत् बध्येत।२२। ना प्रमाथि+जिह्वया बडिशैः मत्स्यवत् लयं एति। सा अल्प+भुज्या असक्त्या जय्या। रसे जिते सर्वं जितम्।२३।

**१६. मासा -** मत्स्यापासून मिळालेले ज्ञान सांगतात. मनाला अशांत करणारी जीभ माणसाचा, आमिषाच्या ओढीने गळींत अडकणाऱ्या माशासारखा घात करते. त्यासाठी मिताहाराने आणि अनासक्तीने जिभेवर ताबा मिळवावा. स्वादाची आवडनिवड टाकून अन्न औषधाप्रमाणे खावे. आधीचा (दुसऱ्या क्रमांकाचा) गुरू जो देहांतर्गत वायू (प्राण) त्याच्याकडून घेतलेलाच हा धडा वेगळ्या तऱ्हेने सांगितला आहे. सर्व इंद्रियांत जिह्वा ही जिंकण्याला कठीण असल्याने तिचा विषय जो रस तो जिंकला की सर्व (विषय) जिंकले असे म्हटले आहे. (*'इन्द्रियाणि जयन्त्याशु निराहारा मनीषिणः। वर्जयित्वा तु रसनं तन्निरन्नस्य वर्धते।।'* भा.पु. ११:८:२०. *'विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः। रसवर्ज्यं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।'* भ.गीता २:५९.)

**१७. वेश्या -** अगदी जिह्वाही जिंकणाऱ्या साधकाच्या परमार्थाला आशा अडवते. त्यासाठी वश्येयेकडून घेतलेले नैराश्याचे शिक्षण पुढच्या अडीच श्लोकांत दिले आहे. विदेहपुरीत राहणारी एक पिंगला नांवाची वेश्या होती. एका रात्री भरपूर पैसे देणाऱ्या गिऱ्हाइकाच्या आशेने (रस्त्यावरील येणाऱ्या-जाणाऱ्या पुरुषांना खुणावीत) दारांत उभी राहिली. रात्रभर वाट पाहूनही अपेक्षित असलेला पुरुष तिला मिळाला नाही. द्रव्याची तीव्र लालसा न पुरल्याने तिला जे वैफल्य आले त्यांतूनच दैवयोगाने तिला परिणामी सुख देणारा उबग (**निर्वेद**) आला आणि तिचा विवेक जागा झाला. स्वतःचा धिक्कार करीत ती म्हणू लागली, 'आपल्याच अंतरात राहणाऱ्या, आत्मानुभवाने निरतिशय आनंद आणि परम पुरुषार्थ देणाऱ्या, हृदयांतील (अहंकाराची) गांठ तोडून संशयाचे जाळे छेदून स्वस्वरूपात रमविणाऱ्या, रामाला सोडून मी ह्या

**वेश्यैकार्थदकान्ताशा-ध्वस्तनिद्रा सुखावहं । चिन्ताहेतुं हि निर्वेदं गत्वाऽत्मस्थं रतार्थदम् ।।२४।।**
**रामं हित्वा कुवृत्त्यान्यं भीशुङ्मोहदमध्रुवम् । काङ्क्षे धिङ्मात्मनात्मानं रमे क्रीत्वाऽमुनेति सा ।।२५।।**
**मत्वा तथाऽभूत्ध्याशाऽकं नैराश्यं परमं सुखम् ।**

एका वेश्या अर्थद+कान्त+आशा+ध्वस्त+निद्रा चिन्ता+हेतुं हि सुखावहं निर्वेदं गत्वा आत्मस्थं रत+अर्थदं।२४। रामं हित्वा कुवृत्त्या अन्यं भी+शुक्+मोहदं अध्रुवं काङ्क्षे। मां धिक्। आत्मना आत्मानं क्रीत्वा अमुना (अहं) रमे' इति सा।२५। मत्वा तथा अभूत्। आशा अकं, नैराश्यं परमं सुखम्।

हीन (वेश्या)वृत्तीने, ज्याच्या मनाविरुद्ध वागल्यास भय, विरहाने शोक आणि अतिस्नेहाने मोह वांट्याला येतात अशा नाशिवंत कामलंपट पुरुषाची इच्छा केली! माझा धिक्कार असो!! यापुढे मात्र मी हा देह स्वयंप्रकाश आत्मारामाला विकून (समर्पण करून) अपरोक्षतया (त्याच्याशी एकरूप होऊन) रममाण होईन.' असा विचार करून आणि आशेचा खोडा मोडून ती आत्मानंदांत निमग्न झाली. यावरून हे सप्ष्ट होते की आशाच सर्व दुःखाचे कारण आहे. नैराश्यांतच निरतिशय सुख आहे. *'निराशः सुखी पिङ्गलावत्'* असे सांख्यदर्शनात (अ.१४ सूत्र ९) म्हटले आहे. (*'आशा हि परमं दुःखं नैराश्यः परमं सुखम्। यथा संछिद्य कान्ताशा सुखं सुष्वाप पिङ्गला।।'* भा.पु. ११:८:४३.)

**१८. टिटवा -** आशारहित साधकानेही जर परिग्रह केला तर दुःखालाच कारण होतो ही टिटव्याची शिकवण एका श्लोकांत दिली आहे. आपल्या आवडत्या वस्तूंचा परिग्रह (संग्रह) दुःखपर्यवसायी आहे हे जाणणाऱ्याला अकिंचनालाही अपरिमित सुख मिळते. अकिंचन म्हणजे केवळ दरिद्री नव्हे तर ज्याने सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे असा. टिटवा मांसाचा घास (न खातां) तोंडांत धरून उडाला तर बाकीचे टिटवे त्याच्यावर हल्ला करून त्याला हैराण करून सोडतात. त्याने तो घास टाकून दिला तर मात्र सगळे टिटवे त्या घासाकडे झेपावतात आणि आमिष टाकून दिलेला (**व्यामिष**) टिटवा परिग्रहापासून मुक्त असल्याने दुरून सुखाने (सुखी) त्यांची मजा पाहात बसतो. (*'सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः। तदामिषं परित्यज्य स सुखं समविन्दत।।'* भा.पु. ११:९:२.)

**परिग्रहोऽकाय तज्ज्ञोऽस्वोऽप्यनन्तसुखायते ।।२६।।**
**सामिषं कुररं हन्ति शूरोऽतो व्यामिषः सुखी । मानावमानचिन्तोनः स्वक्रीडः स्वरतिः सुखी ।।२७।।**
**बालवद्धि जडोऽज्ञोऽर्भश्-चात्मानन्दो गुणातिगः । भङ्क्त्वैकैकं महारावान् रणन्तौ द्वौ कुमार्यपि ।।२८।।**
**पाण्योर्धृत्वैकैकशङ्खं रहःकृत्येऽलभत्सुखम् । कलिर्भूम्नि द्वयोर्वार्ता ह्येकतस्तच्छङ्खवच्चरेत् ।।२९।।**

परिग्रहः अकाय। तज्ज्ञः अस्वः अपि अनन्त+सुखायते। सामिषं कुररं शूरः हन्ति, व्यामिषः सुखी। मान+अवमान+चिन्ता+ऊनः स्व+क्रीडः स्व+रतिः जडः अज्ञः बालवत् सुखी। अर्भः गुण+अतिगः च आत्म+आनन्दौ। द्वौ रणन्तौ एक+एकं महा+रावान् (शङ्खान्) भङ्क्त्वा पाण्योः एक+एक शङ्खं धृत्वा कुमारी अपि रहः+कृत्ये सुखं अलभत्। भूम्नि कलिः द्वयोः वार्ता हि शङ्खवत् एकतः चरेत्।२८-२९।

**१९. बालक -** अशा परिग्रहशून्यालाही मानापमान आणि चिंता सोडतां आले तर तो परमसुखी होईल. ही बालकापासून घेतलेली शिकवण एका श्लोकात सांगतात. त्रिगुणात्मक प्रकृतीला ओलांडून परमात्मस्वरूप झालेला योगी, मान, अपमान आणि चिंता यांनी रहित असलेल्या स्वतःशीच खेळणाऱ्या आणि आपल्यातच हरवून गेलेल्या निष्क्रीय, अजाण बालकाप्रमाणे आत्मानंदात निमग्न असतो. आत्मसाक्षात्कारी पुरुष आणि बालक हे दोघेही चिन्तामुक्त असल्याने आपल्याच आनंदांत परमानंदात न्हात असतात. (*'द्वावैव चिन्तया मुक्तौ परमानन्द आप्लुतौ। यो विमुग्धो जडो बालो, यो गुणेभ्य परं गतः।।'* भा.पु. ११:९:४.)

**२०. कुमारी -** ह्या गुणातीत अवस्थेच्या प्राप्तीसाठी अभ्यासाची आवश्यकता आहे. हा अभ्यास अनेकांनी करून होत नाही आणि दोघांतही होत नाही हे कुमारीच्या कांकणाकडून घेतलेले कपिलमुनिप्रणीत सांख्यदर्शनातील (४:१०) शिक्षण सांगितले आहे. कुणी एक कुमारी घरांतील सर्व कुटुंबीय बाहेर गेलेले असतां आलेल्या सोयऱ्यांच्या पाहुणचारासाठी एकांतात साळी कांडायला बसली. त्या वेळी तिच्या हातातील शंखांच्या कांकणांचा मोठा आवाज होऊ लागला.

**एकचार्यप्रमत्तोऽल्प-वाग्गुहास्थोऽगृहो मुनिः । एकोऽहिवद्गत्यलक्ष्यो गृहारम्भोऽध्रुवात्मनः ।।३०।।**
**विफलोऽकाय सर्पोऽन्य-कृतधाम्न्येधते सुखम् ।**

अहिवत् मुनिः एक+चारी अप्रमत्तः अल्प+वाक् अगृहः गति+अलक्ष्यः। अध्रुव+आत्मनः गृह+आरम्भः।३०। विफलः अकाय। सर्पः अन्य+कृत् धाम्नि सुखं एधते।

त्या आवाजाने आपली गरीबी पाहुण्याना कळेल ह्या लाजेने तिने सगळी कांकणे काढली आणि प्रत्येक हातात फक्त दोन-दोन ठेवली. पण त्याचाही आवाज होतो असे पाहून तिने आणखी कांकणे काढून हातात सौभाग्यचिह्न म्हणून एकेकच कांकण ठेवले (***'पाण्योः एकैक शंखं धृत्वा'***). अशा रीतीने तिचे साळी कांडण्याचे काम गुप्तपणे करून (***'रहःकृत्ये'***) ती सुखी झाली (***'सुखं अलभत्।'***). या कलियुगात भूलोकी अनेकजण किंवा दोघेसुद्धा एकत्र आले की खाण्यापिण्याच्या (विषयाच्या, प्रपंचाच्या) गोष्टी होणारच. त्यामुळे शंखा(च्या कांकणां)प्रमाणे एकट्यानेच तप करावे. (*'वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि। एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कङ्कणः।।'* भा.पु. ११:९:१०.)

**२१. सर्प -** वरीलप्रमाणे निःसंग झाल्यावरही परमार्थांत विघ्न होऊं नये यासाठी ठराविक घर करू नये हे सर्पाकडून घेतलेले शिक्षण दीड श्लोकात सांगितले आहे. मुनीने सापासारखे एकट्याने संचार करीत (***'एकचारी'***), सावधानपणे (***'अप्रमत्त'***), बोलणे मोजके ठेवून (***'अल्पवाक्'***), बाहेरील वर्तनावरून आपली आंतरिक स्थिती प्रकट न होऊ देता (***'गतिअलक्ष्यो'***), वास्तव्यासाठी घर न बांधता (***'अगृहो'***) गुहेत किंवा घळीत राहावे (***'गुहास्थः'***). नाशिवंत देहासाठी (***'अध्रुवस्य आत्मनः'***) घर बांधण्याचा खटाटोप (***'गृहारम्भः'***) व्यर्थ (***'विफलः'***) आणि कष्टदायक (***'अकाय'***) आहे हे जाणून, *'अनारम्भेऽपि परगृहे सुखी सर्पवत्'* कपिलमुनींच्या वचनाला (सांख्यदर्शन ४:१०) अनुसरून साप जसा दुसऱ्याने बांधलेल्या घरांत सुखाने राहतो तसे राहावे. (*'एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः। अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः।। गृहारम्भोऽतिदुःखाय विफलश्चाध्रुवात्मनः। सर्पः परकृतं वेश्म प्रविश्य सुखमेधते।।'* भा.पु.११:९:१४-१५.)

**जितश्वासासनेनेशे वैराग्याभ्यासबद्धहृत् ।।३१।।**
**संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्ववृद्ध्यैत्यनिन्धनम् । निर्वाणं वेत्त्यतो नान्तर्-बहिःस्थं मुनिरात्मदृक् ।।३२।।**
**यथेष्वितात्मेषुकृन्नो वेदेनं यान्तमग्रतः ।**

जित+श्वास+आसनेन वैराग्य+अभ्यास+बद्ध+हृत् ईशे।३१। संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्व+वृद्ध्या अनिन्धनं निर्वाणं एति। अतः आत्म+दृक् मुनिः अन्तः बहिस्थं न वेत्ति।३२। यथा इषु+आत्मा इषु+कृत् अग्रतः यान्तं इनं न वेद।

**२२. शरकार -** एकांतात वास करणाराही जर आसन आणि श्वास यांना जिंकेल तरच त्याला अविचल एकाग्रतेचा लाभ होईल हे शरकाराकडून घेतलेले शिक्षण आतां दोन श्लोकात सांगतात. वैराग्यपूर्वक अभ्यास करून आसनजय आणि प्राणजय साधणाऱ्या योग्याने द्वैताचे भानही जिच्यात राहत नाही अशा समाधीच्या सिद्धीसाठी दोषदृष्टीचा त्याग आणि विषयांचा भोग न मिळाला तरी तळमळ न होणे यांच्या सरावाने दृढ झालेल्या ऐहिक आणि पारलौकिक विषयांसंबंधीच्या वैराग्याने विक्षेपांचा निरास करून, चित्ताला स्थिर करण्याच्या अभ्यासाने चित्तावर ताबा मिळवून ते बाणाप्रमाणे प्रणवरूपी धनुष्यावर चढवून त्याचे प्रत्यक्ब्रह्माशी एकरूप अशा परब्रह्माच्या लक्ष्यावर उत्तम प्रकारे संधान करावे. भावार्थ असा. *'यत्रैकाग्रता तत्राविशेषात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (४:४:११) (चित्ताची) एकाग्रता हे ध्यानाचे प्रमुख साधन होय. ती एकाग्रता *'आसीनः संभवात्'* या सूत्रानुसार (४:१:७) आसनानेच साधत असल्याने प्रथम आसनजय केला पाहिजे. आसन पक्के झाले की मग श्वासावर नियंत्रण करतां येते. श्वास(प्राण)जय झाला की श्वासाच्या अधीन असलेले मनही निश्चल होते. त्याला वैराग्याने विक्षेपरहित करून आणि अभ्यासाने बांधून म्हणजेच वश करून (**अभ्यासेन बद्धं**) ध्येयावर (परमेश्वरावर) स्थिर करावे (**ईशे संयुक्तं**). त्या मनाचा झोपेत जसा लय होतो तसा मुळीच होत नाही. लय आणि विक्षेप हे मनाचे गुणधर्म असले तरी परमानंदस्वरूप ईश्वराशी संलग्न झाल्याने लय-विक्षेपांना कारणीभूत तमोगुण आणि रजोगुण यांचे दमन होते आणि सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो.

**प्रेम्णाप्यचलहृद्ध्यानाद्-विष्णोः सारूप्यमेति ना ।।३३।।**
**प्राग्रूपमुत्सृजन्पेशस्कृद्ध्यानात्कीटवद्द्रुतम् ।**

विष्णोः प्रेम्णा अचल+हृत्+ध्यानात् ना प्राक्+रूपं उत्सृजन् पेशस्कृत्+ध्यानात् कीटवत् द्रुतं सारूप्यं एति।३३।

शेवटी सत्त्वगुणाचाही उपशम होऊन ते मन तिन्ही गुण आणि त्यांची कार्ये यांच्यापासून मुक्त होते (**कर्मवासनां मुक्त्वा**). असे वृत्तिशून्य (**निर्वाणं**) मन ध्येयाकार (ब्रह्माकार) होऊन आपल्या स्वरूपात स्थिर होते. आा रीतीने पतंजलींच्या *'योगश्चित्तवृत्तिनिरोधः'* (यो.सू. १:४) 'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्' या सूत्रांनसार योग सिद्ध होतो. वृत्तिशून्य मनाच्या ध्येयाकार अवस्थेलाच योगाच्या भाष्यकारांनी असंप्रज्ञात समाधी असे नाव दिले आहे. (*'मनसो वृत्तिशून्यस्य ब्रह्माकारतया स्थितिः। याऽसम्प्रज्ञातनामाऽसौ समाधिरभिधीयते।।'*) द्वैताचे भानच नसल्याने आंत-बाहेर त्या योग्याला कांहीच दिसत नाही कारण तो स्वरूपाच्या दर्शनात निमग्न असतो (*'आत्मदृक्'*). आतां दृष्टान्त सांगितला आहे. *'इषुकारवन्नैकचित्तस्य समाधिहानिः'* या सांख्यसूत्रानुसार (४:१४) बाणाला धार लावण्यात गढून गेलेल्या शरकाराला ('इषुकार') समोर रस्त्यावरून वाजतगाजत गेलेला राजाही (**इन**) कळला नाही. अशा उपासकाला (प्रारब्धाच्या प्रतिबंधाने) आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वीच मृत्यू आला तर त्याच्या अभ्यासाच्या प्रभावाने आणि ईश्वराच्या अनुग्रहाने मृत्यूच्या वेळी सुषुम्ना नाडीचा मार्ग मिळून तो मुक्त होतो अशा अर्थाचे ब्रह्मसूत्र आहे (४:२:१७). *('मन एकत्र संयुज्याज्जितश्वासो जितासनः। वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतन्द्रितः।। यस्मिन्मनो लब्धपदं यदैतच्छनैः शनैर्मुञ्चति कमरेणून्। सत्त्वेन वृद्धेन रजस्तमच विधूय निर्वाणमुपैत्यनिन्धनम्।। तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किञ्चिद्बहिरन्तरो वा। यथेषुकारो नृपतिं व्रजन्तमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे।।'* भा.पु. ११:९:११-१३.)

**यथोर्णनाभिस्ततोर्णां विहार्यान्तेऽत्ति तां तथा ।।३४।।**

**प्राक्स्वमायासृष्टमेकः संहृत्याभूत् क्षयेऽद्वयः । शक्त्याखिलाश्रयः सर्वेट् कालेनात्मानुभावतः ।।३५।।**

यथा ऊर्णनाभिः ऊर्णां तत विहार्य तां अत्ति तथा..।३४। एकः प्राक् स्व+माया+सृष्टं (जगत्) संहृत्य क्षये अद्वयः अभूत्। शक्त्या अखिल+आश्रयः सर्वेट् आत्म+अनुभावतः..।३५।

**२३. कुंभारीण माशी (पेशस्कार) -** वरीलप्रमाणे ध्याननिष्ठ असलेल्या साधकाला जीवात्म्याशी एकरूपच अशा परमात्म्याचे स्वरूप प्राप्त होणे हे नवल नाही, हे कीटकापासून मिळवलेले ज्ञान आतां सांगत आहेत. प्रेमाने, द्वेषाने किंवा भयानेसुद्धा (**प्रेम्णा अपि**) व्यापक परमात्म्याचे (**विष्णोः**) स्थिर चित्ताने ध्यान केले म्हणजेच, विजातीय प्रत्ययांचा निरास करीत आणि सजातीय प्रत्ययांना प्रवाहित करून निदिध्यासन केल्याने, मिथ्या उपाधींशी तादात्म्य पावून अध्यासाने स्वीकारलेले कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादींनी युक्त असे मायिक रूप (जीवत्व) टाकून देऊन पुरुष (**ना**) शीघ्रच परमात्म्याशी एकरूप होतो. ('प्रारब्धजनित') प्रतिबंध नसले तर याच जन्मात अन्यथा जन्मातराने तो मुक्त होतो. हेच व्यासमुनींनी *'ऐहिकमप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्'* सांगितले आहे. प्रतिबंधांच्या अभावी ज्या जन्मी उपदेश व अभ्यास त्याच जन्मी ज्ञान होऊन मोक्ष होतो हे ठीक आहे. पण तसा तो झाला नाही तर जन्मांतरी होतो याला प्रमाण म्हणून ऐतरेय उपनिषदातील (२:५) वामदेवाने गर्भात पहुडलेल्या अवस्थेतच आपले ज्ञान प्रकट केल्याचे उदाहरण दिले आहे. कुंभारीण माशीने आपल्या घरट्यात आणून ठेवलेला किडा जसा तिच्याकडून वरचेवर दंश झाल्याने तिच्या भयाने तिचे निरंतर ध्यान करून तिच्यासारखाच (कुंभारीण माशीच) होतो. जीव तर स्वरूपतः ब्रह्मच असल्याने (*'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'*, बृ.उ. ४:४:५१) त्याचे ब्रह्मरूप पावणे हे नवल नाही. ('यत्र यत्र मनो देही धारयेत् सकलं धिया। स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वाऽपि याति तत्तत्स्वरूपताम्।। कीटः पेशस्कृतं ध्यायन् कुडां तेन प्रवेशितः। याति तत्साम्यतां राजन् पूर्वरूपमसन्त्यजन्।।' भा.पु. ११:९:२२-२३.)

**साम्येतसत्त्वादिशक्तिः प्रधानपुरुषेडजः । व्युपाधिः परमानन्दो मोक्षाख्यः सपरावरः ।।३६।।**
**गुणत्मिकां स्वमायां स क्षोभयन्स्वानुभावतः । तया सृजति सूत्रं सा त्रिगुणा शक्तिरासृजत् ।।३७।।**
**विश्वं यस्मिन्प्रोतमेतद् येन संसरते पुमान् ।**

साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः वि+उपाधिः प्रधान+पुरुष+ईट् अजः मोक्ष+आख्यः स+पर+अवरः परम+आनन्दः (आस्ते)।३६। सः स्व+अनुभावतः गुण+आत्मिकां स्व+मायां क्षोभयन् तया सूत्रं सृजति। सा त्रिगुणा शक्तिः विश्वं असृजत्।३७। यस्मिन् पुमान् संसरते येन तत् विश्वं प्रोतम्।

**२४. कांतीण -** ईश्वराच्या एकमेवाद्वितीयत्वाचे कांतिणीकडून घेतलेले ज्ञान आतां सांगितले आहे. कुठल्याही बाह्य सामग्रीविना कोळीण (**ऊर्णनाभी**) जशी आपल्याच नाभीपासून निघालेल्या तंतूला मुखाद्वारे काढून तो पसरून त्या जाळ्यात क्रीडा करते आणि ती क्रीडा झाल्यावर ते जाळे खाऊन टाकते. त्याचप्रमाणे सृष्टीच्या पूर्वी (**'प्राक्'**) स्वयंभू एकमेवाद्वितीय (**'एकः'**) परमेश्वराने आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) उपादानकारण जी माया तिच्या द्वारां जगाची उत्पत्ती केली. जगताच्या लयाच्या वेळी (**क्षये**) आपल्याच काळशक्तीने त्याचा आपल्यांतच उपसंहार करून पुनश्च तो एकमेवाद्वितीय झाला. कालांतराने आपल्या आत्मशक्तीने (**आत्मानुभावतः**) सत्त्वादि त्रिगुणांची साम्यदशा झाल्यावर (**साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः**), प्रकृती आणि पुरुष यांचा स्वामी आणि म्हणूनच अजन्मा (**प्रधान+पुरुष+ईट् अजः**) असलेला निरुपाधिक (**व्युपाधिः**) परमानंदस्वरूप (**परमानंदः**) मोक्ष (**मोक्षाख्यः**) तोच आहे. हा कोण आहे? ब्रह्मा? नव्हे तर ब्रह्मादि श्रेष्ठ आणि इतर सर्व जीवात्मे यांचा स्वतांत उपसंहार करणाराच (**सपरावरः**) मोक्षरूपी परमात्मा आहे. तोच परमात्मा आपल्या आत्मशक्तीने (**स्वानुभावतः**) आपल्या त्रिगुणात्मक मायेला क्षोभवून तिच्या द्वारा जीवाच्या संसरणाचे कारण जे क्रियाशक्तिप्रधान महत्तत्त्व (**सूत्र**) निर्माण केले. त्याच त्रिगुणात्मक शक्तीने त्या सूत्रापासून अहंकाराद्वारा सर्व विश्वाची निर्मिती केली. त्याच कारणभूत समष्टीरूप सूत्राने हे जग गुंफले आहे.

**देहात्स्तो बोधवैराग्ये पारक्यात्सोद्भवक्षयात् ।।३८।।**
**आत्मेष्टभृत्सृष्टबीजः प्रियेच्छुर्नश्यति द्रुवत् । गावः स्वार्थे सपत्नीवत्तं लुनन्ति हि दुर्लभम् ।।३९।।**
**मत्वा नृजन्मात्तवित्क्ष्मां चरे मुक्तोऽनहंकृतिः ।**

पारक्यात् स+उद्भव+क्षयात् बोधवैराग्ये स्तः।३८। प्रिय+इच्छुः आत्म+इष्ट+भृत् सृष्ट+बीजः द्रुवत् नश्यति। इन्द्रियाणि तं सपत्नीवत् लुनन्ति।३९। नृजन्म दुर्लभं हि मत्वा आत्त+वित् क्ष्मां अन्+अहंकृतिः चरे।

याज्ञवल्क्याने गौतमाला सांगितल्याप्रमाणे हा लोक, परलोक, सर्व जीवमात्र ज्या सूत्रांत बांधलेले आहेत ते सूत्र म्हणजे वायूच होय (बृ.उ. ३:७:२). याच प्राणात्मक सूत्राने जीव या संसारांत फिरत असतो. (*'केवलात्मानुभावेन स्वमायां त्रिगुणात्मिकाम्। संक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिन्दम।। तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजन्तीं विश्वतोमुखम्। यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान्।। यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां संतत्य वक्त्रतः। तथा विहृत्य भूयस्तां ग्रसत्येवं महेश्वरः।।'* भा.पु. ११:९:२२-२३.)

**देह**सुद्धां गुरूच आहे हे सांगतात. देह कोल्ह्याकुत्र्यांसारख्या परक्यांचे भक्ष्य (**पारक्यात्**) होत असल्याने त्याच्यापासून विवेकाचे (**बोध**) शिक्षण मिळते. मातेचे रक्त ('रज') आणि पित्याचे रेत या दोन मलांपासून देहाची उत्पत्ती (**उद्भव**) होते आणि मृत्यू (**क्षय**) तर जन्माच्या आधीपासूनच त्याच्या मागे लागलेला आहे. असा घृणास्पद देह सतत धारण करणे ह्यापेक्षा वैराग्याला अधिक मोठे कारण काय असूं शकते? विष्णुपुराणात म्हटले आहे की आपल्या देहाच्या दुर्गंधीला जो माणूस विटत नाही त्याला वैराग्य व्हायला दुसरा काय उपदेश करावा? स्वतःचे आणि स्वकीयांचे पोषण करणारा (**आत्म+इष्ट+भृत्**) सदैव सुखाची अभिलाषा बाळगणारा (**प्रियेच्छुः**) हा देह, दुसऱ्या वृक्षाचे बीज निर्माण करून सुकणाऱ्या वृक्षाप्रमाणे जन्मांतराचे बीजरूप कर्म निर्माण करून नाश पावतो. इंद्रिये ह्या देहरूपी पतीला, सवतीसारख्या आपापल्या विषयांकडे खेचत असतात.

**तच्छ्रुत्वा समचित्तोऽभून् मुक्तसङ्गो यदुर्द्रुतम् ।।४०।।**

तत् श्रुत्वा यदुः द्रुतं सम+चिच्चः मुक्त+सङ्गः अभूत्।४०।

असे असले तरी आत्मज्ञानाचा अधिकार या देहाला असल्याने तो दुर्लभ मानून वरील चोवीस गुरूंकडून घेतलेल्या ज्ञानाने सर्व संगांचा त्याग करून निरहंकार वृत्तीने या भूमीवर अवशिष्ट प्रारब्ध भोगीत मी ह्या पृथ्वीवर संचार करतो. (*'देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्त्वनिधनं सततार्त्युदर्कम्। तत्त्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसङ्गः।।* भा.पु. ११:९:२५.)

हा यदुराजाला सर्व संग आणि त्याचे मूळ अहंकार यांना सोडून निर्विकारपणे प्रारब्ध भोगीत संचार करण्याचा अप्रत्यक्ष आदेशच होता. सद्‌गुरुकृपेने ज्ञान झाल्यानंतर संचित कर्माचा नाश होतो. प्रारब्ध मात्र भोगूनच संपवावे लागते, ह्या छांदोग्योपनिषदातील (६:१४:२) आणि ब्रह्मसूत्रातील (४:१:१९) सिद्धांताला हे धरूनच आहे. हा त्या अवधूताचा आदेश श्रवण करून यदुराजा, अधिकारी उपदेशकाच्या प्रभावाने, ज्याचे चित्त सम म्हणजे सर्वसंगपरित्याग केल्याने शत्रू, मित्र, उदासीन, आप, पर हे सर्व ज्याला सारखेच आहेत, तसा झाला; किंवा ज्याचे चित्त सम म्हणजे विकारशून्य आहे असा झाला. याज्ञवल्क्यस्मृतीत (प्रायश्चित्ताध्याय, ५४) म्हटल्याप्रमाणे कांट्यांनी ओरबाडणाऱ्यावर किंवा चंदनाने माखणाऱ्यावर जो सारखाच शांत ('अक्रुद्ध') आणि प्रसन्न ('परितुष्ट') असतो असा यदु झाला. हा सद्गुकृपेचा प्रभाव होय.

अधिकारी सद्‌गुरूंकडून श्रवण केल्याने हे ज्ञान यदूला लगेच झाले. कठोपनिषदांत प्रतिपादल्याप्रमाणे (१:२:७-८) या ब्रह्मज्ञानाचा निपुण वक्ता ही नवलाईचीच गोष्ट आहे; तसेच ह्या ज्ञानाची प्राप्तीही कुणा विरळ्या भाग्यवंतालाचा होते. अनधिकारी वक्त्याकडून हे समजणे शक्य नाही. स्वरूपसाक्षात्कार झालेल्या गुरूविना ह्या अचिंत्य आणि सूक्ष्मतम

ज्ञानात गती होत नाही. (*'अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः। सर्वसङ्गविनिर्मुक्तः समचित्तो बभूव ह।।'* भा.पु. ११:९:३३.)

असे **हे परमार्थाचा उपदेश करणारे गुरू नाहीत तर आपल्या बुद्धीने केलेले असंभावनादि दोषांचे निराकरण करणारे गुरू आहेत** हे लक्षात घ्यायला हवे. बृहदारण्यक उपनिषदांत (३:९:२७) याज्ञवल्क्याने ह्याच औपनिषद पुरुषाविषयी शाकल्याला विचारले होते आणि त्याला उत्तर देतां न आल्याने त्याचे मस्तक गळून पडले होते. वरील ३८ श्लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी अवधूतगीता (दत्तपुराण ४५:८ च्या टीकेत) असे नांव देऊन ते श्लोक तिथे तसेच दिले आहेत.

## प्रह्लादास उपदेश

आतां चार श्लोकांत (दत्तप्रभूंनी) प्रह्लादावर केलेल्या अनुग्रहाचे संक्षेपाने वर्णन केले आहे. हाच विषय श्रीमहाराजांनी श्रीमद्दत्तपुराणाच्या १५ व १६ व्या अध्यायात विस्ताराने मांडला आहे. त्या अध्यायांतील संबंधित श्लोक एकत्र करून ते स्तोत्रसंग्रहात 'श्रीदत्तात्रेयहृदयम्' या नांवाने प्रसिद्ध झाले आहे. अवधूतगीतेप्रमाणेच याही आख्यानाचे मूळ श्रीमद्भागवत पुराणात आहे. विषयाची मांडणी, शब्दयोजना इत्यादीही भागवतातील मूळ आख्यानाला अनुसरूनच आहेत. कांही कांही श्लोक तर जवळ जवळ सारखेच आहेत. ह्या दोन्ही स्रोतांचा उपयोग करीतच आपण ह्या चार श्लोकांची टीका पाहणे उद्बोधक ठरेल.

भागवतपुराणात सप्तम स्कंधांत नारद-युधिष्ठिर संवादात हे आख्यान नारदांनी सांगितले आहे. बालपणापासून भागवत धर्मात रमलेला असूनही प्रह्लादाला आत्मज्ञानाच्या अभावाने परम शांतीची प्राप्ती झाली नाही. त्यामुळे उदासीन वृत्तीने शिकारीच्या निमित्ताने तो आपल्या लवाजम्यासह रानावनात संचार करीत असतां कावेरीच्या तीरी सह्याद्री पर्वतावर त्याला सद्भाग्याने, धुळीच्या लेपाने ज्याचे मलापहारक तेज झांकलेले आहे,

**कष्टसंसारादिहेतु-प्राणार्थेहापनुत्तये । वैराग्यतोषदमधुकृन् महाहिसुशिक्षितम् ॥४१॥**

कष्ट+संसार+आदि+हेतु+प्राण+अर्थ+इहा अपनुत्तये वैराग्य+तोष+दं मधुकृत्+महा+अहि+सुशिक्षितम्..।४१।

असा एक अवधूत भूमीवर पहुडलेला दिसला. भागवतात अवधूत शब्दाचा उपयोग न करता त्याचा आजगर मुनि असा निर्देश केला आहे. त्याच्या बोलण्याचालण्यावरून किंवा इतर बाह्य चिह्नांवरून लोकांना त्याच्या वर्णाचा वा आश्रमाचा कांहीच पत्ता लागत नव्हता. त्याच्या पायांवर मस्तक ठेवून प्रह्लादाने त्याला नमस्कार केला, त्याची विधिवत् पूजा केली आणि तो महाभागवत दैत्य त्याला नम्रपणे प्रश्न करू लागला. 'महाराज! आपण कांही उद्योग करतांना दिसत नाहीत आणि निर्धन आहांत तरी एखाद्या भोगवान पुरुषाप्रमाणे आपला देह पुष्ट दिसतो. खरे तर उद्योगाने धन संपादन केल्यावर आहार-विहारादि इष्ट भोग प्राप्त झाल्यानेच माणसाचा देह असा पुष्ट होतो. आपण तर ज्ञानी, निपुण, वाक्पटु आणि कार्यक्षम असूनही इथे कांहीच न करता झोपलेले दिसता! तरीही आपले शरीर पुष्ट कसे आहे? आपल्याला प्राण किंवा धन यांची कांहीच चिंता दिसत नाही. या निर्मनुष्य ठिकाणी आपल्याला कशाचेच भयही वाटत नाही. आपले हे चरित्र खरोखर अतर्क्य आहे! कृपया, आपण आपल्याला योग्य वाटल्यास, मला पडलेल्या या प्रश्नाचे उत्तर द्यावे.' प्रह्लादाने नम्रपणे आणि साक्षेपाने, जिज्ञासापूर्वक विचारलेल्या या प्रश्नाने संतुष्ट झालेल्या परमकारुणिक अत्रिपुत्र दत्तप्रभूंनी, 'सगुण साक्षात्कार होऊनही हा अजून अज्ञानीच आहे' हे जणू जाणूनच कृपापूर्ण स्मित करीत बोलण्यास आरंभ केला. 'दैत्यकुलात जन्मूनही आपल्या भक्तीने नरसिंहाला अवतार घ्यायला लावणारा नारदमुनींचा शिष्य तूच आहेस ना? तुझ्या हृदयांत भगवान नारायणांचा निरंतर निवास आहे आणि तू शुद्ध अव्यभिचारी भक्तीने, सूर्याने अंधार पळवावा तसे, अज्ञान नष्ट करतोस. तूं अंतःकरणाच्या शुद्धीच्या इच्छेने हे प्रश्न विचारीत असल्याने मी तुला सांगतो. ऐक!'

'मी अज्ञानवश दुष्पूर वासनासरितांच्या लाटांत वाहात कर्मगतीने अनेक योनीत फिरत फिरत अखेर स्वर्ग, मोक्ष आणि नरक यांचे द्वार असलेल्या ह्या मनुष्य जन्माला आलो. इथे मी पाहिले की सुखासाठी सर्वच धडपडतात पण त्यांच्या वाटाला दुःखच येते.

**प्रऱ्हादायाप्यात्मतत्त्वं प्राहेदं भगवान् परम् । स्वरूपं सुखमीहोप-रतिस्तनुरशाश्वतान् ।।४२।।**
**दृष्ट्वा भोगान्संविशन्सन् स्वपेन्नेतः परं हितम् ।**

इदं आत्म+तत्त्वं भगवान् प्रऱ्हादाय अपि प्राह। स्वरूपं सुखं इहा+उपरतिः तनुः।४२। भोगान् अशाश्वतान् दृष्ट्वा संविशन् सन् स्वपेत्। इतः परं हितं न।

त्यामुळे **दुःखासारखेच सुखही अनायासच मिळते** असा विचार करून मी सुखासाठी प्रयत्न करण्याचे सोडून दिले. खरे तर स्वरूपतः आपण (आत्मा) सुखरूपच असतो. प्राण आणि धन यांची लालसाच या कष्टमय संसाराचे मूळ कारण आहे. ती घालवण्यासाठी मधमाशी आणि अजगर यांच्याकडून वैराग्य तसेच संतोष देणारे शिक्षण मी घेतले आहे.'

त्याच परमात्म्याच्या ज्ञानाचा उपदेश भगवान दत्तात्रेयांनी प्रह्लादाला केला. 'आपण खरे तर सुखरूपच आहोत. अज्ञानाने अनुभवाला येणारे हे जे दुःख आहे ते आपले वास्तविक स्वरूप नाही. विचार करून पाहिल्यास जिथे जिथे आपण (आत्मा) तिथे तिथे दुःख आहेच असे नाही. म्हणजेच दुःख आगंतुक आहे. ते आत्म्याचे स्वरूप होऊच शकत नाही. झोपेत असतांना किंवा समाधीत असतांना आत्मा साक्षित्वाने विद्यमान असूनही दुःखाचा पत्ताही नसतो. यावरून दुःख हे तापवलेल्या पाण्याच्या उष्णतेप्रमाणे तात्कालिक असते. स्वभावतः पाणी जसे थंड असते तसाच आत्माही सुखरूप आहे. हे अनुभवाला येत नाही त्याचे कारण त्याला अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश ह्या पांच क्लेशांचा अडसर असतो. हे क्लेश नष्ट झाले की आपला स्वाभाविक आनंद आपोआपच प्रकटतो. ह्यांच्यामुळेच आपण निरनिराळ्या वासनांच्या फेऱ्यांत सांपडतो. त्या वासनांचा उपशम झाला की आपले आंतरिक आत्मसुख आपोआपच प्रकटते. पाण्यासाठी व्याकुळलेल्या अभाग्याने शेवाळाने झांकलेले पाणी सोडून मृगजळाच्या मागे धावावे तसे हे लोक आपल्याच अंतरांतला आनंदाचा झरा सोडून सुखप्राप्तीसाठी वायांच धडपडत असतात. क्वचित् काकतालीय न्यायाने

ह्या धडपडीला यश आल्यासारखे वाटले तरी ते वैषयिक सुख मृगजळाप्रमाणे क्षणभंगुर असते. काम आणि अर्थ ह्यांच्या अभिलाषेनेच शोक, मोह, राग, द्वेष आणि श्रम होतात. अशा रीतीने चित्त विचलित झालेल्या पुरुषाला भय आणि चिंता यांच्या योगाने धड झोपही येत नाही. असे **हे ऐहिक भोग, आदि आणि अंत असलेले, क्षणभंगुर, अशाश्वत आहेत तसेच ते परतंत्रही आहेत** हे जाणून मी दैवाने प्राप्त होणाऱ्या भोगांचे सेवन निरिच्छपणे करूनही त्यांच्यासाठी कसलेही प्रयत्न न करतां स्वस्थ पडून राहतो. यदृच्छेने कांहीच न मिळाले तरी दैवानेच सर्व गोष्टी मिळतात असा निश्चय करून धीराने अजगरासारखा झोपून राहतो. यापेक्षां श्रेष्ठ असे दुसरे कल्याणकारक साधन नाही. मधमाशी आणि अजगर यांचे शिष्यत्व स्वीकारून मी प्राणाची तसेच वित्ताची इच्छा टाकून दिली आहे. द्रव्याचा लोभ सोडल्याने मला आता दंड, कर, राजस्व यांच्याद्वारा धन नेणाऱ्या राजाची, चोरांची वा याचकांची भीती उरली नाही. जीवाची आशा सोडल्याने मी हिंस्र प्राणी, शत्रू किंवा काळ यांनाही मुळीच घाबरत नाही. भ्रमर (मधमाशी) जसा निरनिराळ्या पुष्पांतून मिळेल तो रस ग्रहण करतो त्याप्रमाणे मी जास्ती-कमी, रुचकर-रुचीहीन, मानाने वा तिरस्काराने, ताजे-शिळे, रात्री किंवा दिवसा जे अन्न मिळेल त्यांत समाधान मानतो. मधमाशीप्रमाणे संग्रह केल्यास मालकाला मारून ते धन दुसरेच घेऊन जातात हे जाणून मी संग्रह करीत नाही. दैवाने मिळेल ते वस्त्र, वल्कल असो की रेशीम, अंगावर घेतो. कधी भस्मावर, कधी दगडावर तर कधी तरटावर, गावांत वा रानात, मी झोपतो. कधी असा धुळीने माखलेला असतो तर कधी कधी छान आंघोळ करून वस्त्रे आणि अलंकार घातलेला असतो. कधी कधी वस्त्रांशिवायच राहतो. कधी पायी, कधी गाडीत, कधी हत्तीवर तर कधी घोड्यावर बसून फिरतो. कधी मौनी असतो तर कधी वेड्यासारखा वागतो. व्यक्ती तितक्या प्रकृती असतात हे ध्यानात घेऊन मी ना कुणाची निंदा करतो ना स्तुती! (*'नाहं निंदे न च स्तौमि स्वभावविषमं जनम्।'*) परमेश्वराजवळ सर्वांचेच भले चिंतितो. ब्रह्माचीच ओढ, ब्रह्मावरच निष्ठा असलेला मी ब्रह्मरूप आहे आणि सर्वांना ब्रह्मबुद्धीनेच पाहतो. सुसंस्कृत ब्राह्मण, अंत्यज, गाय किंवा श्वान हे मला सारखेच आहेत.' (*'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।।'* भ.गीता ५:१७.)

**हुनेद्विकल्पं चित्तौ तां मनस्यर्थभ्रमे तु तत् ।।४३।।**
**वैकारिके तं मायायां तां स्वस्मिन्विरमेत्ततः । इत्युक्त्वा विररामाजः प्रऱ्हादोऽप्यभवत्तथा ।।४४।।**

विकल्पं चि;त्तौ हनेत् । तां अर्थ +भ्रमे मनसि (हुनेत्) तत् तु.. ।४३। वैकारिके (हुनेत्) तं मायायां (हुनेत्) । तां स्वस्मिन् (हुनेत्) प्रऱ्हादः अपि तथा अभवत्।४४।

आतां दत्तप्रभू हा स्वरूपानंद कसा प्राप्त करायचा तो योग सांगत आहेत. 'प्रथम विकल्पाचा चित्तांत लय करावा. ते चित्त मग विषयांत भुलणाऱ्या मनात स्थिरवावे. त्या मनाचा वैकारिक अहंकारांत (पर्यायाने बुद्धीत अथवा विज्ञानमय कोशांत) लय करावा. ती बुद्धी महत्तत्त्वसहित मायेत स्थिरवावी. शेवटी त्या मायेचा आत्म्यांत (**स्वस्मिन्**) विलय करावा. **विकल्प** म्हणजे इंद्रिये आणि **चित्ति** म्हणजे त्यांची विषयाकडची धांव. पहिल्यांदा इंद्रियांना विषयांपासून वळवून मनांत स्थिर करावे. हाच पतंजलींनी सांगितलेला **प्रत्याहार** होय. त्यानंतर ते विषयरहित झालेले मन बुद्धीत विरवावे. हीच **धारणा**. ही स्थिरावलेली बुद्धी महत्तत्त्वांत आणि मायेत विरवावी (**ध्यान**) आणि अंती ती माया आत्मस्वरूपांत स्थिर करावी (**समाधी**). इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, अव्यक्त (महत्, माया) आणि पुरुष ही परंपरा कठोपनिषदांत (१:३:१०) स्पष्ट केली आहे. हीच प्रक्रिया तेथे पुढीलप्रमाणे सांगितली आहे. 'सूज्ञ माणसाने वाचेचा (इंद्रियांचा) संयम मनांत करावा; त्या मनाचा बुद्धीत (*'ज्ञानआत्मनि'*), त्या बुद्धीचा महत्तत्त्वात आणि महत्तत्त्वाचा लय प्रशांत अशा आत्मतत्त्वात करावा (१:३:१३). 'इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, महत्तत्त्व, आणि आत्मा हे एकापेक्षा एक सूक्ष्म, व्यापक आणि आंतरिक आहेत. अशा रीतीने हा अनात्म पदार्थांचा अनुक्रमाने विलय श्रुतीने *'सा काष्ठा सा परा गति'* महणून प्रतिपादलेल्या आत्मरूपांत करावा. 'तो नित्य, शुद्ध, बुद्ध, सर्वभेदातीत परमात्माच मी आहे' हे पक्के झाले की संसारातून मुक्त होशील. हे माझे गूढतम हृदयच मी तुझ्यापुढे उघडे केले आहे. त्याचे सावधानतेने मनन कर. हे माझे हार्द अत्यंत नम्र आणि श्रद्धावंतालाच सांगावे.' हे स्वतःला हृदयांत सामावणारे रहस्य सांगून दत्तप्रभू निःशब्द झाले. प्रह्लादही त्या उपदेशाने प्राप्त झालेल्या अनुभवाने तसाच - निःशब्द आणि तटस्थ झाला.

**देवोऽर्जुनायापि योगं प्राहाष्टाङ्गं निवृत्तये । सद्वाच्याविद्याशबल-ब्रह्मातोऽव्यक्तकं महत् ।।४५।।**

देवः अर्जुनाय अपि निवृत्तये अष्टाङ्ग+योगं प्राह। सत्+वाच्य अविद्या+शबल+ब्रह्मातः अव्यक्तकं, (अव्यक्तात्)महत् ।४५।

आतां कार्तवीर्य अर्जुनाचा अनुग्रह सांगत आहेत. देव याचा अर्थ द्योतनात्मक म्हणजेच स्वयंप्रकाश दत्तप्रभू असा आहे. 'त्याच्या प्रकाशानेच हे सर्व उजळलेले आहे,' या मुंडकोपनिषदाच्या (२:२:१०) आणि 'जे सूर्य, चंद्र आणि अग्नी यांच्यांत प्रविष्ट झालेले तेज आहे ते माझेच आहे' ह्या गीतावचनाचा (१५:१२) हाच अभिप्राय आहे. कार्तवीर्याला संसारातून निवृत्त होण्यासाठी दत्तप्रभूंनी अष्टांगयोगाचा उपदेश केला. त्यांपैकी, पातंजल दर्शनानुसार अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम आणि तप, संतोष, शौच, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान हे पांच नियम ही पहिली दोन अंगे आहेत. शांडिल्य उपनिषदांत आणि सूतसंहितेत अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, आर्जव, क्षमा, धृति (धैर्य), मिताहार, शौच हे दहा यम तसेच तप, संतोष, आस्तिक्य, सिद्धान्तश्रवण, ईश्वरपूजन, दान, ह्री (लज्जा), मति (सद्बुद्धी), जप आणि व्रताचरण हे दहा नियम मानले आहेत. ह्यांची लक्षणे विस्तारभयाने दिली नाहीत. ती त्या त्या ग्रंथांतून पाहावीत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे. कुणी यम आणि नियम हे स्वाभाविक मानवधर्म असल्याने उरलेली सहाच अंगे मानून 'षडंग' योगाचे प्रतिपादन करतात तर कुणी समाधी हे योगाचे फळ मानून 'सप्तांग' योगाचे प्रतिपादन करतात. ह्या ठिकाणी भगवंतांनी, समाधीचे सविकल्प आणी निर्विकल्प असे दोन भाग करून, एकाचा समावेश अंगांत करून 'अष्टांग' योगाचा उपदेश केला आहे.

**निवृत्तये** या शब्दांतून अध्यारोपजनित संसाराचा अपवादाने निरास करून त्यापासून मुक्त होणे हा अर्थ सुचविला आहे. ह्या अध्यारोपाचे स्पष्टीकरण पुढे सत् या पदापासून *'सदेव सोम्य इदमग्र आसीत्'* ह्या छांदोग्य उपनिषदाच्या वचनाद्वारे सांगितले आहे. सत् म्हणजे जो सदैव, तिन्ही काळात असतो तो, म्हणजेच आत्मा होय.

**ततस्ततोऽहङ्कारोऽस्मात् पञ्चतन्मात्रखाद्यतः । जगत्सकार्यविकृत-भूतान्युर्वात्मवर्ष्म तत् ।।४६।।**

ततः अहङ्कारः, अस्मात् ख्आदि पञ्च+तन्मात्र, अतः जगत् । स+कार्य+विकृत+भूतानि उरु+आत्म+वर्ष्म । तत् ।४६।

छांदोग्यातच पुढच्या अनेक मंत्रांत सदेव न म्हणता *'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किञ्चन मिषत्'* असे म्हटले आहे. यावरून देश, काल, वस्तू या त्रिविध परिच्छेदविरहित आत्माच 'सत्' शब्दाने अभिप्रेत आहे. 'अतति' सर्वत्र जाणारा किंवा सर्वांना व्यापणारा तो आत्मा. त्यालाच नित्य, शुद्ध, बुद्ध इत्यादि लक्षणांचे निरतिशय ब्रह्म ('बृह' धातूपासून वाढणारे) म्हणतात. प्रलयकाली आधीच्या सृष्टीतील सर्व प्राणिमात्रांनी केलेली पण परिपक्व न झालेली कर्मे, मायाविशिष्ट ब्रह्मात राहून हळूहळू पचत (पिकत) असतात. त्या कर्मांनाच अविद्या म्हणतात. आणि त्यांनी युक्त असलेल्या ब्रह्माला 'अविद्याशबलब्रह्म' म्हणतात. हीच कर्मे परिपक्व झाली की त्यांचा भोग देण्यासाठी ह्या ब्रह्माला पुन्हा जगत् निर्माण करण्याची इच्छा होते. हाच ऋग्वेदांत (१०:१२९:४) प्रतिपादलेला सर्वप्रथम प्रकटणारा 'काम म्हणजेच मनाचे बीज' होय. हेच शबलब्रह्म जगाचे अभिन्न निमित्त आणि उपादान कारण आहे. हेच स्वतःपासूनच जग निर्माण करते. घटाला जसे माती हे उपादान कारण आहे आणि कुंभार हे निमित्त कारण आहे तशी दोन कारणे सृष्टीला नाहीत. ह्या ब्रह्मापासून अव्यक्त म्हणजे माया जन्म घेते आणि मायेपासून महत् नांवाचे तत्त्व निर्माण होते. महत्तत्त्वापासून अहंकार, अहंकारापासून पंचतन्मात्रासहित आकाश, वायू, तेज, आप आणि पृथ्वी ही पंचमहाभूते उत्पन्न होतात. आतां कुणी विचारतील की तैत्तिरीय उपनिषदात (२.१.१) तर 'आत्म्यापासून आकाश संभवते' असे म्हटले आहे. तर अव्यक्त शब्दाने दर्शविलेली माया ब्रह्माची शक्तीच आहे. तिला स्वातंत्र्य नाही. 'न तस्य कार्यं कारणं च विद्यते' असे श्वेताश्वतरोपनिषदांत म्हटलेच आहे. इथे अव्यक्तांतच अंतर्भूत असलेल्या महत् आणि अहंकार यांचा स्पष्ट वेगळा उल्लेख केला आहे एवढेच. आत्म्यापासून आकाश जन्म घेते या श्रुतिवाक्याशी कसलाच विरोध नाही.

आरंभवाद आणि परिणामवाद यांचे खंडन इथे विस्तारभयाने केले नाही. हे सर्व ब्रह्मसूत्रभाष्याच्या दुसऱ्या अध्यायात पाहावे.

**जागृतिर्गोभिरर्थाप्तिर् विश्वस्तदभिमानवान् । सकार्यशुद्धभूतानि लैङ्गात्मात्मा स भौतिकः ।।४७।।**
**हिरण्यगर्भः स्वप्नः स्यात् करणोपरमेऽर्थयुक् । प्राक्संस्कारोत्थानुभूतिस् तैजसोऽत्राभिमानवान् ।।४८।।**

गोभिः अर्थ+आप्तिः जागृतिः । विश्वः तत्+अभिमान+वान् । स+कार्य+शुद्ध+भूतानि लैङ्ग+आत्मा सः भौतिकः ।४७। हिरण्य+गर्भः स्वप्नः स्यात् करण+उपरमे+अर्थ+युक् । प्राक्+संस्कार+उत्थ+अनुभूतिः तैजसः अत्र+अभिमान+वान् ।४८।

अगदी शेवटच्या कार्यापर्यंत आत्माच सर्वांचे उपादान कारण असल्याने अव्यक्तापासून म्हणजे अव्यक्तभावाला प्राप्त झालेल्या आत्म्यापासून असे समजावे. आकाशादि पांच महाभूतांपासून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणांची वाढ झाली. म्हणून पंचमहाभूतांपासून जगत् झाले. **कार्या**सहित म्हणजेच विषयांसहित **विकृत** म्हणजे पंचीकृत भूतांपासून स्थूल देह (**'उरुवर्ष्म'**) आणि विराट (**'तत्'**) उत्पन्न झाले.

या स्थूल देहांत **'गो'** म्हणजे इंद्रियांपासून **'अर्थाप्ति'** म्हणजे विषयांचे ग्रहण ज्या अवस्थेत होते ती जागृती अवस्था होय. स्थूल देह आणि जागृती यांचा अभिमानी जीवाला **'विश्व'** म्हणतात. शुद्ध म्हणजे अविकृत, अपंचीकृत महाभूतें आणि त्यांची कार्ये पंचतन्मात्रा यांचा मिळून आत्म्याचा लिंगदेह, ज्याला सूक्ष्म देह असेही म्हणतात, तो होतो. तो स्थूलदेहाप्रमाणेच भौतिक (भूतांपासून झालेला) आहे.

समष्टीच्या लिंगदेहालाच **हिरण्यगर्भ** असे नांव आहे. इंद्रियांचा उपशम झाला की हा सूक्ष्म देह पूर्वीच्या (**प्राक्**) जागेपणीच्या संस्कारांच्या स्मृतीने विषयांचा अनुभव घेतो. तीच **स्वप्ना**वस्था होय. लिंगदेह आणि स्वप्नावस्था यांच्या अभिमानी जीवाला (जाग्रतीतल्या विश्वालाच) **'तैजस'** असे नांव आहे. बृहदारण्यकांत (४.३.९) या अवस्थेत पुरुष (जीव) स्वयंप्रकाश होतो, स्वप्नांतील सृष्टीची रचना तोच करतो असे म्हटले आहे.

**द्विहेत्वात्मावित्साभासा-ऽव्याकृतं ज्ञानसंहृतिः । धीहेत्वात्मस्थितिः सुप्तिर्मानी प्राज्ञोऽत्र तत्परम् ।।४९।।**

द्वि+हेतू आत्म+अवित्स +आभासा अव्याकृतम् । धी+हेतु+आत्म+स्थिति सुप्तिः । अत्र प्राज्ञः । तत्+परं।४९।

ह्या दोन (**'द्वि'**) देहांचे कारण (**'हेतू'**) असणारे आत्म्याचे अज्ञान (**'आत्म+अवित्'**) आणि आभासरूप जीव (**'स+आभासा'**) यांना **अव्याकृत** ही संज्ञा आहे. अस्पष्ट दशेत असलेले म्हणजे अव्याकृत. स्पष्टपणे व्यक्त न झालेले, आकाराला न आलेले ते अव्याकृत! *'तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्'* (बृहदारण्यक उ. १.४.७) ह्या श्रुतीप्रमाणे उत्पत्तीच्या पूर्वी जग अव्याकृत असते. त्या वेळी पंचभूतादींचे हे जग सत्याचे अधिष्ठान जे ब्रह्म त्यांत रोंवलेले असते. ह्याचा आत्मतत्त्वाच्या ज्ञानाने लय होत असल्याने त्याला 'सत्' म्हणजे खरे म्हणतां येत नाही, पुढे दृश्य स्वरूपांत व्यक्त होणार असल्याने 'असत्' म्हणजे खोटे म्हणतां येत नाही. सत् आणि असत् हे परस्परविरोधी धर्म असल्याने त्याला 'सदसत्' असेही म्हणतां येत नाही. आत्मस्वरूपापासून त्या अव्याकृताला भिन्न म्हणावे तर द्वैत मानावे लागते आणि आत्म्याच्या श्रुतिप्रतिपादित अद्वितीयत्वाला बाध येतो. त्याला आत्म्याशी अभिन्न मानले तर त्यांच्यासारखा आत्माही जड ठरतो. भिन्न आणि अभिन्न ह्या दोन्ही परस्परविरोधी स्थिती एकत्र असूं शकत नाहीत म्हणून त्यांना भिन्नाभिन्नही म्हणतां येणार नाही. हे अव्याकृतच पुढे जगात परिणत होत असल्याने त्याला निरवयव म्हणतां येत नाही. आकाशादि निरवयवांचीही उत्पत्ती त्यापासून होत असल्याने त्याला सावयवही म्हणतां येत नाही. अशा रीतीने अव्याकृताला **अनिर्वचनीय** म्हणावे लागते. तेसुद्धा ब्रह्माशी ऐक्याच्या ज्ञानाने नाहीसे होते. हाच **कारणदेह** होय. सर्व प्रकारच्या ज्ञानांचा उपसंहार (**ज्ञानसंहृतिः**) होऊन बुद्धी (**धियो**) कारणदेहात स्थिरावते ती सुषुप्ती (**निद्रा**) अवस्था जाणावी. कारणदेह आणि सुषुप्ती यांचा अभिमानी झालेला जीव **प्राज्ञ** म्हणवतो. तैजसाचाच सुषुप्तीत प्राज्ञ होतो. इथे स्पष्टपणे सांगितलेला नसला तरी विश्व, तैजस आणि प्राज्ञ यांच्यातला अभेद लक्षांत घेतला आहे. जगाच्या कारणरूपाने प्राज्ञ नांवाच्या आत्म्याचे चिंतन करावे (*'जगत्कारणरूपेण प्राज्ञात्मानं विचिन्तयेत्।'*) असे श्रीमच्छंकराचार्यांच्या पंचीकरणावरील वार्तिकांत (श्लोक ४५). **तत्परं** हे पद पुढच्या श्लोकाला जोडून वाचावे.

**शुद्धादिलक्ष्मचिन्मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते । यमादिवान्पीठवित्सद्-गुरूक्त्यापूर्य चेडया ।।५०।।**

(तत्+परं) शुदाध+आदि+लक्ष्म+चित्+मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते यम+आदि+वान् पीठ+वित् सत्+गुरु+उक्त्या चेड्या आपूर्य.. ।५०।

बुद्धी कारणदेहांत स्थिरावली की वृत्ती उठत नाहीत. वृत्तींवर बुद्धीचा प्रभाव असतो तसाच बुद्धीच्या साक्षीचा - प्रत्यगात्म्याचाही, असतो. बद्धीतून उद्‌भवणाऱ्या सर्व वृत्ती तापलेल्या लोखंडाच्या ठिणग्यांसारख्या आत्म्याच्या चैतन्याच्या स्पर्शाने तेजाळलेल्या असतात (तैत्तिरीय उ. भाष्यवार्तिक). अशी ही बुद्धी वटवृक्ष जसा वडाच्या बीजांत सामावावा तशी कारणदेहांत सामावून राहते. आतां त्यांच्या म्हणजे जाग्रती, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या पलीकडे असलेले शुद्ध, बुद्ध, नित्य इत्यादि लक्षणांनी युक्त असे चैतन्यमात्र ब्रह्म गुरूंनी उपदेशिलेल्या *'तत्त्वमसि'* (ते ब्रह्म तू आहेस) ह्या महावाक्याने लक्षिले जाते.

श्लोकाच्या उत्तरार्धापासून हठयोगाचे निरूपण केले आहे. **यमनियम** अंगी बाणविलेल्या आणि आसनाचा जय केलेल्या साधकाने गुरूंच्या निर्देशाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली पुढे सांगितलेल्या प्राणायामाचा अभ्यास करावा. कठोपनिषदांतील (१.२.९) सिद्धांताप्रमाणे आपली 'बुद्धी चालवून योगाभ्यास करूं नये'. *'ईडया आपूर्य'* ही पदे पुढच्या श्लोकाशी जोडून वाचावीत.

**ईडा** या डाव्या नाकपुडीने बाहेरचा प्राण जोराने आंत ओढून पूरकाच्या चौपट काळ जालंधरबंधाने (गळा छातीशी दाबून घरून) पोटांत धरून ठेवावा, म्हणजेच **कुंभक** करावा. हा कुंभक जपसहित वा नुसता (जपरहित) करतां येतो. नंतर दुसऱ्या म्हणजे उजव्या **पिंगला** नाडीद्वारा उड्डियान बंध लावून (पोट आंत ओढून), हळूंहळूं प्राण बाहेर सोडावा, म्हणजेच **रेचक** करावा. वेगाने किंवा जोरांत रेचक केल्यास बलहानी होऊ शकते. दुसरा प्राणायाम उलट रीतीने, म्हणजे पिंगलेने पूरक आणि इडेने रेचक करावा. नंतर पुन्हां पहिल्यासारखा असे दहा कुंभक दिवसांतून तीन वेळां करीत गेल्याने तीन महिन्यांत प्राणजय होतो. जिंकलेल्या प्राणाने इंद्रिये विषयांपासून मनांत बांधावी. हा **प्रत्याहार** होय.

**धारयेदात्मन्यचलं विक्षिप्तं शश्वदात्मनि । स्थिरीकुर्वन्छ्रुतं ध्यायेच्छ्रुतियुक्त्या निरासतः ।।५२।।**
**विजातिप्रत्ययस्यान्य-प्रवाहीकरणं भजेत् । गुरूक्तं षड्लिङ्गवित्तं तं भागत्यागलक्षितम् ।।५३।।**

आत्मनि अचलं धारयेत् । विक्षिप्तं शश्वत् आत्मनि स्थिरीकुर्वन् श्रुतं ध्यायेत् । श्रुति+युक्त्या निरासतः... ।५२। (श्रुति+युक्त्या निरासतः) विजाति+प्रत्ययस्य अन्य+प्रवाही+करणं भजेत् । गुरु+उक्तं षड्+लिङ्ग+वितं भाग+भाग+त्याग+लक्षितं ।५३।

चित्त स्थिर करून नाभ्यादि देशांत धरून ठेवावे. मग ते मन *'देशबन्धश्चित्तस्य धारणा'* या पतंजलींच्या वचनानुसार हीच **धारणा** होय. दैवयोगाने मन विक्षिप्त (चंचल) होऊन विषयांत गुंतले तर सारखा पुनःपुन्हा अभ्यास करून ते स्थिर करावे आणि गुरूंकडून श्रवण केलेल्या तात्पर्याचे, आत्मस्वरूपाचे ध्यान करावे.

**तात्पर्यनिर्णयाचे सहा निकष -** श्रुतींना, वेदांना अनुकूल अशा युक्तीने, तर्काने द्वैताच्या संस्कारांचे निरसन करीत, गुरुमुखांतून श्रवण केलेल्या, उपनिषदांत प्रतिपादलेल्या, अद्वैत आणि प्रत्यगात्म्याशी एकरूप असलेल्या परब्रह्म स्वरूपाच्या अनुभूतीत प्रवाहित करावे. गुरूंनी वेदांतवाक्याने उपदेशिलेले ब्रह्मरूप वेदांताच्या अभ्यासानेच जाणून घ्यावे, कारण *'तत्तु समन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार वेदांतांतच ब्रह्मरूपाचे प्रतिपादन आहे. या गुरूपदिष्ट ब्रह्मरूपाचे तात्पर्य श्रीमदादिशंकराचार्यांनी सांगितल्याप्रमाणे उपक्रमादि सहा लिंगांच्या आधारेच करावे. *'उपक्रमोपसंहारावभ्यासोऽपूर्वता फलम्। अर्थवादोपपत्तौ च लिङ्गं तात्पर्यनिर्णये।'*. छांदोग्योपनिषदांत ब्रह्माविषयी केलेल्या प्रतिपादनांत 'सदेव सोम्य' असा 'उपक्रम' करून (६.२.१) *'स आत्मा तत्त्वमसि'* असा 'उपसंहार' केला आहे हे पहिले लिंग (१). वरचेवर अनेक वेळां आलेले 'तत्त्वमसि' (ते ब्रह्म तू आहेस) हे वाक्य म्हणजे अभ्यास नांवाचे लिंग आहे (२). शब्दावांचून (प्रत्यक्ष, अनुमान आदि) अन्य प्रमाणानी त्या ब्रह्माचे ज्ञान होत नाही ही 'अपूर्वता' हे तिसरे लिंग आहे (३). हा एक आत्मा जाणला की सर्व जाणले जाते हे 'फल' होय (४). जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय, त्यांत प्रवेश आणि त्याचे नियमन हे पांच 'अर्थवाद' होत (५). मृत्तिका, सुवर्ण आदि दृष्टांत हे उपपत्ती नांवाचे सहावे लिंग आहे (६).

**तत्त्वमस्यादिवाक्यार्थं सोऽहमात्मेत्यभेदतः । नादेयं नश्वरं चित्तं लये सम्बोधयेत्पुनः ।।५४।।**

भाग+त्याग+लक्षितं तत्+त्त्वं+असि+आदि+वाक्य+अर्थम् सः अहं आत्मा इति अभेदतः नश्वरं न आदेयम्। लये पुनः सम्बोधयेत्।५४।

पुराणातही (बृहत्संहिता) 'गुरुमुखांतून वेदांतवाक्यांचे श्रवण केल्यावर उपक्रमादिलिंगांनी त्यांच्या तात्पर्याचा निश्चय करावा. नंतर त्या वाक्याच्या अनुसंधानाने तो अर्थ ग्रहण करणारे मनन करावे. श्रवण आणि मनन यांच्यातील एकाग्रता म्हणजे निदिध्यासन. आत्मज्ञान उत्पन्न होण्यासाठी बुद्धिमान साधकाने विविध तर्कांनी तटस्थ आणि 'अतत्' संस्कारांची व्यावृत्ती करीत, अंतरंग श्रवण, मनन आणि चिंतन ही केली पाहिजेत. तसेच शमदमादि षटकाचाही अभ्यास करावा.' ह्याच श्रवण-मनन-निदिध्यासनांचा निर्देश कहोळ ब्राह्मणात याज्ञवल्क्यांनी 'पांडित्य, बाल्य आणि मौन' या शब्दांनी केला आहे. 'बाल्य' याचा बालवय किंवा निर्बंध स्वैराचार असा होऊ शकत नाही कारण हे दोन्ही मननाला उपयोगी तर नाहीतच पण प्रतिबंधकच आहेत. *'अनाविष्कुर्वन्नन्वयात्'* ह्या ब्रह्मसूत्रानुसार (३.४.५०) राग, द्वेष, मान, अपमान ह्यांच्या प्रभावाने होणाऱ्या बाह्य प्रवृत्तीचा त्याग करून निरागस, शुद्ध भावांत राहण्याला बाल्य म्हटले आहे. 'ब्राह्मणाने (श्रवणाने) पांडित्य पूर्णपणे संपादन करून (मननाचा अभ्यास करीत) 'बाल्य'त्वाने राहावे. बाल्य आणि पांडित्य आत्मसात केल्यावर (निदिध्यासनासाठी) 'मौन' धरावे.' (बृहदारण्यक उ. ३.५.१). यांत मौनाचा ब्रह्मसूत्रानुसार (३.४.४७) विध्यात्मक अर्थ घ्यावा. अंतःकरणातून बलिष्ठ भेदवासनांचा प्रभाव नाहीसा करण्यासाठी ज्ञानाभ्यास निरंतर चालविण्यासाठी निदिध्यासनात्मक मौन धारण करायचा विधि सांगितला आहे. ध्यान वरचेवर करावे लागते. म्हणजे त्याची आवृत्ती करावी लागते. कोंडा बाजूला होईपर्यंत साळी कांडाव्या लागतात त्याचप्रमाणे ब्रह्मसाक्षात्कार होईतोंवर *'आवृत्तिरसकृदुपदेशात्'* या ब्रह्मसूत्राला (४.१.१) अनुसरून श्रवणादींची आवृत्ती आवश्यकच आहे. *'भागत्यागलक्षितम्'* हे पद पुढच्या श्लोकांतल्या 'तत्त्वमस्यादिवाक्यार्थम्' या पदाचे विशेषण आहे.

भागत्यागलक्षणेने सूचित होणाऱ्या 'ते तू आहेस' या वाक्याचे 'तो (आत्मा) मी आहे' असे अभेदतया चिंतन करावे. शब्दाचा अर्थ तीन प्रकारे लावतां येतो, मुख्य, गौण आणि लक्षणा. ब्रह्म हे अनिर्वचनीय असल्याने त्याचा मुख्य किंवा गौण अर्थ लावतां येत नाही. यासाठी लक्षणा वृत्तीनेच अर्थ लावला पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत 'ते' व 'तू' या पदांची समानता ('सामानाधिकरण्य') दिसते. श्रीमच्छंकराचार्यांनी वाक्यवृत्तीत (४७) सांगितल्याप्रमाणे मुख्यार्थ घेतल्याने जर प्रमाणाशी विसंगत अर्थ निघत असेल, मुख्यार्थाविना येणाऱ्या प्रतीतीला लक्षणा म्हणतात. म्हणजेच 'तत्' आणि 'त्वं' पदांचा परस्परसंबंध 'लक्ष्य' आणि 'लक्षणा' असा होतो. लक्षणा तीन प्रकारची असते. जहती, अजहती आणि भागत्याग (*जहत्यजहती*). ज्या वेळी मुख्यार्थ पूर्णपणे सोडून वेगळाच अर्थ काढला जातो तिला *'जहल्लक्षणा'* असे म्हणतात. उदाहरणार्थ गंगेतला गोठा (*'गंगायां घोषः'*) इथे वाहत्या नदीत गोठा असूं शकत नाही. म्हणून गंगेचा नदी हा अर्थ सोडून नदीचा कांठ असा अर्थ घेतल्यावर तो बरोबर जुळतो. लक्षणेच्या दुसऱ्या प्रकारांत मुख्यार्थाला जोडून आणखी अर्थ घ्यावे लागतात. ही 'अजहल्लक्षणा' होय. उदाहरणार्थ 'कावळ्यापासून अन्न राख' याचा अर्थ केवळ कावळेच नाही तर इतर सर्व प्राण्यापासूनही अन्नाचे रक्षण करावे असा केला पाहिजे. अन्यथा कावळे सोडून इतर प्राण्यांना अन्न खाऊ द्यायला मोकळीक आहे असा अर्थ निघेल. ह्या दोन्ही लक्षणा महावाक्याला लागत नाहीत. कारण ते आणि तू या पदांचे लक्ष्यार्थ एक असू शकत नाहीत आणि सर्वथा वेगळेही असू शकत नाहीत. यासाठी दोन्ही पदांचे समान अंश ग्राह्य धरून असमान अर्थ टाकले तर 'लक्ष्यार्थ' स्पष्ट होतो. जुना मित्र अनेक वर्षांनी भेटला की त्याची ओळख पटण्यासाठी 'तो हा देवदत्त' असे सांगावे लागते. फार पूर्वी दूरदेशी तरुणावस्थेत ज्याच्याशी मैत्री झाली तोच हा वृद्ध आत्तां इथे भेटतोय असा त्याचा अर्थ होतो. त्याचे वय, रूप, स्थान इत्यादि वेगळे आहेत पण नांव आणि मित्रत्व तसेच आहेत. अशा भिन्न किंवा विसंगत अर्थ सोडून उरलेल्या समान आणि सुसंगत अर्थांनी ओळख पटते. 'ते तू आहेस' या वाक्यात 'ते' पदाचा अर्थ मायेत प्रतिबिंबित झालेला ईश्वर आणि मायेचे अधिष्ठान ब्रह्म, असा वाच्यार्थ आहे आणि सत्य, ज्ञान, अनंत इत्यादि लक्षणांनी निर्दिष्ट चैतन्य हा 'लक्ष्यार्थ' आहे. 'तू' पदाने अविद्या, तिच्यात

प्रतिबिंबित झालेला जीव आणि अविद्येचे अधिष्ठान कूटस्थ चैतन्य हा वाच्यार्थ आणि साक्षीभूत चैतन्य हा लक्ष्यार्थ आहे. वरील देवदत्ताच्या उदाहरणाप्रमाणे इथे 'ते' आणि 'तू' या पदांचे वाच्यार्थ भिन्न असले तरी लक्ष्यार्थ निःसंशय एकच आहे. वस्तुतः ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला अंतःकरणाच्या उपाधींमुळे दुःखादि सांसारिक धर्म चिकटलेले भासतात.

**सोऽहमात्मेत्यभेदतः -** हा विरोध वास्तविक नसल्याने 'तो(च) मी आहे' असा त्यांचा अभेदच आहे. ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) श्रुतींनीही आत्मा शब्द ब्रह्म ह्या अर्थानेच स्वीकारला आणि प्रतिपादला आहे. अशा प्रकारें मनन आणि निदिध्यासन केल्यानेच आत्मसाक्षात्कार होतो. यावर असा आक्षेप घेतां येईल की वेदानुसार (केनोपनिषद १.५) तर आत्मा मनाचा विषय होऊं शकत नसल्याने त्याचे मनन कसे होईल? स्वयंप्रकाश आत्म्याला मन प्रकाशत नाही हे खरेच आहे. पण हा निषेध फक्त फलव्याप्तीचा आहे. इतर वस्तूंच्या मननाने ती वस्तू मनांत आकारते. हीच फलव्याप्ती. पण आत्मज्ञानासाठी वृत्तिव्याप्तीच पुरेशी आहे. अंधारांत पडलेली दोरी पहायला दिवा लागतो. दिवा मात्र इतर प्रकाशाच्या साधनाविना दिसतो. तसाच आत्म्याचा प्रकाश मनांत पडल्याने तो जाणवतो. ह्यालाच 'वृत्तिव्याप्ती' असे म्हटले आहे. त्यामुळेच बृहदारण्यक उपनिषदांत आत्मा 'मनानेच पाहावा' असे या अर्थानेच म्हटले आहे. पंचदशीतही (७.९२) म्हटले आहे, 'ब्रह्माच्या अज्ञानाचा नाश करण्यासाठी वृत्तिव्याप्तीचीच अपेक्षा आहे. ब्रह्म स्वतःच (अंतःकरणात) स्फुरत असल्याने त्याचा आभास होऊंच शकत नाही.' अभेदतः ह्या शब्दाने जीवात्मा (प्रत्यक्) आणि (पर)ब्रह्म यांची अखंडैकरसता सुचविली आहे. वाक्यवृत्तीत (३९-४१) सांगितल्याप्रमाणे, 'प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार अद्वितीय आणि आनंदघन असाच होतो. अद्वयानंदस्वरूप ब्रह्म हेच प्रत्यग्बोधाचे लक्षण आहे. आत्मा आणि ब्रह्म यांचे असे परस्पर तादात्म्य पक्के झाले की 'त्वं' पदाच्या अर्थाचे (जीवाचे) ब्रह्मापासून वेगळेपण आणि 'तत्' पदाची परोक्षताही तत्काल दूर होतात. तदनंतर जीवात्म्याची जाणीव पूर्णानंद अद्वितीय रूपानेच स्थिर होते.' जीवात्मा आणि परमात्मा यांचे अखंड एकरसत्व केवळ परस्पर तादात्म्यानेच सिद्ध होत नाही ह्या आक्षेपाचे निराकरण करण्यासाठी नीलकमलाचा

दृष्टांत देतात. नील आणि कमल ह्या दोन पदांत 'नील' हे विशेषण व 'कमल' हे विशेष्य असून त्यांचा मिळून अर्थ 'निळ्या रंगाचे कमळ' असा होतो. हे त्यांचे तादात्म्य असले ते अखंडैकरस नाहीत. नील हा गुण आहे आणि कमल हे द्रव्य आहे, हा भेद कायमच आहे. तसाच आत्मत्व आणि ब्रह्मत्व ह्यांच्यातला भेद राहणारच असे म्हणाल तर ते तसे नाही. नीलता ही कमळाशिवाय मेघ आणि इतर वस्तूंतही आढळते. तसेच कमळ हे लाल, पांढरे असे इतर रंगाचे असूं शकते. अर्थात् त्यांच्या अर्थांतच भेद असल्याने अखंडार्थ होऊं शकत नाही. आत्मत्व आणि ब्रह्मत्व हे मात्र एकमेकांशिवाय कुठेच आढळत नाही. विश्वरूपाचार्यांनी वाक्यवृत्तीत म्हटल्याप्रमाणे, 'आत्मता ही ब्रह्माशिवाय अन्य ठिकाणी आढळत नाही आणि ब्रह्मता आत्म्यावांचून कुठेच दिसत नाही. नीलोत्पलापेक्षां हे विलक्षण आहे.'

**नादेयं नश्वरं -** समाधीलाभासाठी ध्यानमार्गाचा अभ्यास करणाऱ्याला अष्टमहासिद्धींचे ऐश्वर्य हे विघ्नच आहे. त्याचा अंगीकार करूं नये.

**चित्तं लये सम्बोधयेत्पुनः -** ध्यानाभ्यास करतांना तमोगुणामुळे कदाचित् चित्ताचा लय होऊं लागला - झोंप येऊं लागली, तर त्याला पुनश्च जागवावे.

**विक्षिप्तं शमयेज्जह्यात् सकषायं समं वरम् । नास्वादयेद्रसं तत्र निःसङ्गः प्रज्ञया भवेत् ।।५५।।**
**निवातदीपवच्चित्तो ब्रह्मात्मा शून्यवृत्तिकः । कृतकृत्यः क्षीणकर्मा भिन्नहृद्ग्रन्थिसंशयः ।।५६।।**

निवात+दीपवत्+चित्तः ब्रह्म+आत्मा शून्य+वृत्तिकः कृत+कृत्यः क्षीण+कर्मा भिन्न+हृत्+ग्रन्थि+संशयः।५६।

**विक्षिप्तं शमयेत्** इतर विषयांच्या ओढीने चित्त चंचल झाले तर त्या विषयांचे चिंतन सोडून ते शांत करून परत ध्यानांत लावावे; **सकषायं जह्यात्** वासनांनी मलिन झाले तर त्या वासनांचा त्याग करावा. **समं वरम्** विक्षेप आणि कषाय यांनी रहित असेल तर उत्तमच! तेच ध्यानांत स्थिर करावे. **रसं न आस्वादयेत्** त्या ध्यानाच्या अवस्थेत जो आनंद स्फुरतो त्याच्या आस्वादांत रमूं नये. त्याच्यापुढे जायचे आहे हे लक्षांत ठेवावे. अशा रीतीने साक्षात्कार होईपर्यंत ध्यान स्थिर करून (**प्रज्ञया निःसङ्गः भवेत्**) बुद्धीने निःसंग व्हावे.

अशा प्रकारे ध्यानाभ्यास करीत निवातीच्या दिव्यासारखे मन स्थिर करावे. हीच समाधी! पंचदशीत (१:५५) सांगितल्याप्रमाणे ध्याता आणि ध्यान ह्यांचा विसर पडून केवळ ध्येयाचेच भान राहून मन निवातीच्या दीपज्योतीप्रमाणे स्थिर होण्यालाच समाधी असे नांव आहे. श्रीमद्‌भवद्‌गीतेतही (६:१९) *'यथा दीपो निवातस्थो नेऽङ्गते सोऽपमा स्मृता'* असेच समाधीचे वर्णन केलेले आहे. पतंजलींनी *'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्'* या सूत्रांतून (१:३) ह्याच अवस्थेचा निर्देश केला आहे. **ब्रह्मात्मा** म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदाच्या वचनानुसार (४:४:६) ब्रह्मरूप होऊन ब्रह्मांत मिळून जाणे. हाच अभ्यास पक्का झाला की वृत्तींचा पूर्ण लोप होतो (**शून्यवृत्तिकः**). अशा रीतीने आत्मज्ञानाने गीतावाक्याप्रमाणे (१५:२०) जीव कृतकृत्य होतो. असे हे तत्त्वाचे ज्ञान झाल्यानंतर आपण कांही कर्म केलेच नाही, करीत नाही व करणारही नाही असा अकर्त्या ब्रह्माशी एकरूपतेचा निर्धार झाल्यानंतर ब्रह्मसूत्राच्या प्रतिपादनानुसार (४:१:१३) झालेल्या वा होणाऱ्या कोणत्याच पापाचा लेशही त्याला स्पर्शत नाही. तसेच ब्रह्माच्या वस्तुसामर्थ्यामुळे औपनिषद सिद्धांताला (बृ.उ. ४:४:२२) आणि वेदांतसूत्रांना (४:१:१४) अनुसरून पुण्यही त्याला लागत नाही. ('नेदों लागों पापपुण्य अंगा'. संत तुकाराम). त्याच्या चित्तांतील सर्व गांठी मोकळ्या होतात आणि सर्व संशय फिटतात (मुंडक उ. २:२:८).

**प्रारब्धभोक्तात्मारामो जीवन्मुक्तो भवेद्ध्रुवम् । इत्युक्त्वोपररामेशः कार्तवीर्यस्तथाभजत् ।।५७।।**
**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तलीलाकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

प्रारब्ध+भोक्ता आत्म+आरामः ध्रुवं जीवन्+मुक्तः भवेत्। इति उक्त्वा ईशः उपरराम। कार्तवीर्यः तथा अभजत्।५७।

**'प्रारब्धभोक्ता'** या पदाने छांदोग्यांत सांगितल्याप्रमाणे (६:१४:२) ज्ञान झाल्यावर लगेच देह पडत नाही हे सूचित केले आहे. ब्रह्मसूत्रांत (४:१:१५) हेच प्रतिपादन आहे. अनारब्ध कर्मांचाच - म्हणजे संचिताचाच नाश होतो प्रारब्धाचा क्षय भोगूनच होतो. त्यामुळे शरीराचा पात होईपर्यंत प्रारब्धकर्म भोगावे लागतेच. भात्यांत असलेला बाण काढणे आणि त्याचे संधान करणे हे तीरंदाजाच्या मनावर असले तरी सोडलेला बाण कांही त्याला परत घेतां येत नाही. त्या बाणाचा वेग कमी झाल्यावरच तो जमिनीवर पडणार. तसेच ज्ञानी पुरुषाच्या प्रारब्धकर्माचे आहे. प्रारब्धानुसार आलेल्या भोगांना तो सादर होत असला तरी त्यांचे त्याला सुख वा दुःख कांहीच नसते हे स्पष्ट करण्यासाठी त्याला **आत्माराम** म्हटले आहे (मुंडक उ. ३:१:४). असा हा ज्ञानी निःसंशय (**ध्रुवं**) जिवंत असतांनाच मुक्त असतो (**'जीवन्मुक्तः'**) आणि देह पडल्यावर त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. देह हा कर्मफलाच्या भोगासाठीच उरलेला असल्याने त्याला ते भोगावेच लागतात; पण ज्ञानी पुरुषाला त्यांचे कांहीच सुख-दुःख नसते. ह्याचा उहापोह ब्रह्मसूत्रांत (४:१:१९) केलेला आहे. यापूर्वी पाहिल्याप्रमाणे प्रतिबंध नसला तर याच जन्मी ज्ञान होते (ब्र.सू. ३:४:५१) श्रुतीत (छां.उ. ८:४:१) आत्म्याला सेतू किंवा तीर म्हटले आहे, त्यावरून कुणी असा अर्थ काढतील की या ब्रह्माला पार करून आणखी कुठल्या तरी स्थानाला ज्ञानी जातो. तर ते तसे नाही. ब्रह्म कांही विशिष्ट बाबतीत सेतूसारखे आहे एवढाच त्याचा अर्थ आहे (ब्र.सू. ३:२:३१). बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:६) देहपातानंतर ज्ञानी पुरुषाच्या प्राणांचे उत्क्रमण होत नाही असे म्हटले आहे. ब्रह्मसूत्रातील निर्देशानुसार (४:२:१२) त्याचे प्राण देहांतच लय पावतात. तापलेल्या तव्यावर टाकलेल्या पाण्यासारखे ते ठायींच जिरून जातात. त्याच्या इंद्रियांचाही लय परमेश्वरांतच होतो. (ब्र.सू. ४:२:१५: प्रश्न उ. ६:५) ब्रह्मरंध्राचा भेद करून जाण्याचे वर्णन उपासकांच्या गतीचे आहे. त्यांना ब्रह्मदेवाबरोबर मुक्ति मिळते.

शुक्लगतीचीसुद्धां ज्ञान्यांना अपेक्षा नाही; कारण त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त दुसरे गन्तव्यच नाही. स्वर्गात जाणाऱ्या जीवांप्रमाणे त्यांना नवीन देह प्राप्त होत नाही. यासाठीच वर **ब्रह्मात्मा** असे म्हटले आहे. छांदोग्यांत (८:३:४) वर्णन केल्याप्रमाणे 'परम ज्योतिरूप प्राप्त करून तो त्या आपल्या मूळ रूपाने प्रकटतो'. ब्रह्मसूत्रानुसार (४:४:४) अपरोक्षानुभवाने प्राप्त होणारे मुक्त स्वरूप हे ब्रह्मापासून वेगळे नाही. म्हणजेच मुक्तीचा अर्थ आपलेच स्वयंसिद्ध आत्मस्वरूप आहे. स्वर्गादिकांप्रमाणे आगंतुक असे कांही नाही (ब्र.सू.३:४:५२). अशा या मुक्त पुरुषाला 'सर्वज्ञत्व, सत्यसंकल्पत्व इत्यादि गुणानी युक्त असा मी आहे' अशी जाणीवसुद्धां होत नाही; कारण ती होण्यासाठी कारणीभूत अविद्या मुळासकट नष्ट झालेली असते. म्हणूनच त्याला शून्यवृत्तिक म्हटले आहे. तो एकाच वेळी सविशेष आणि निर्विशेष ब्रह्माशी एकरूप झालेला असल्याने त्याला काळाचा भेद नाही (ब्र.सू. ४:४:५-७). अशा रीतीने दत्तप्रभूंनी उपदेशाचा समारोप केला आणि कार्तवीर्य अर्जुनाने त्यानुसार आचरण केले.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा चौथा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पंचमोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पुराणोक्तावतारास्तु श्रुता यद्भवतोच्यते । तन्मे शुश्रूषवे व्यासाच्छंस त्वन्याश्च तत्कथाः ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**साधु पृष्टं त्वया वत्स शृणुष्वाऽवहितोऽमलाः । तत्कथा याः पुनन्त्यत्र श्रोतॄन्वक्तारमप्यघात् ।।२।।**

नामधारक उवाच। पुराण+उक्ताः अवताराः तु श्रुताः। यत् भवता उच्यते तत्, अन्याः च तत् कथाः, मे शुश्रूषवे शंस।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स, त्वया साधु पृष्टम्। अमलाः तत्+कथाः अवहितः शृणु, याः अत्र श्रोतॄन् वक्तारं अपि अघात् पुनन्ति।२।

**पंचमाध्यायी दत्तात्रेय ब्राह्मणीच्या भक्तीला। भुलून तियेचा श्रीपादनामा पुत्र झाला।।**
**हरुनि भावांचे अंधत्व तसे पंगुत्व निघाला। तीर्थटणा, लोकोद्धार करायला।।**

विवेक, वैराग्य, शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा आणि समाधान ही षट्संपत्ती आणि तीव्र मुमुक्षा ह्या चार साधनांनी संपन्न असलेला साधकाला गुरूंच्या उपदिष्ट महावाक्यांचे श्रवण, मनन, निदिध्यासन करून आत्मरूपाचा ऐक्यरूपाने साक्षात्कार होतो. परमार्थाला विमुख असलेल्यांना मात्र आपल्या अधिकारानुरूप कर्म, उपासना तसेच योग या साधनांनी प्रथम अंतःकरणाची शुद्धी आणि चित्ताची एकाग्रता संपादन करावी लागते. त्याने अर्थातच शमदमादि षट्संपदाही प्राप्त होतेच. विमुखांना कर्माचा उपदेश केला असला तरी गीतेत सांगितल्याप्रमाणे कर्माची गती गहन आहे. विहित कर्म, निषिद्ध कर्म (विकर्म) तसेच अकर्म (कर्म न करणे) हे सर्व नीट समजून घेतले पाहिजेत. ('कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं ह्यपि कर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहनो कर्मणा गतिः।।' भ.गीता ४:१७). हे कर्माचे तत्त्व ठाउक नसेल तर (विहित) कर्म करायला जावे तर तेच विकर्म होते आणि कधी कधी विकर्म केल्यानेच कर्म घडते. अशा प्रकारे विवेकाने भगवंताच्या प्रीतीसाठी म्हणून केलेल्या कर्मानेच सात्त्विक भक्ताला भगवंताचा कृपाप्रसाद लाभतो हे स्पष्ट करण्यासाठीच ह्या अध्यायाचा आरंभ केला आहे.

**धर्मं गोप्तुं सतस्त्रातुं दुष्टान्हन्तुं युगे युगे । लीलाधाम्नाऽवतरति नाऽन्यत्किञ्चित्प्रयोजनम् ।।३।।**
**दीनान्हीनमतीन्ज्ञात्वा दुर्बलान्नॄन्स कच्चरे । आविरासीत्समुद्धर्तुं प्रेम्णा भक्तिविधित्सया ।।४।।**

युगे युगे धर्मं गोप्तुं, सतः त्रातुं, दुष्टान् हन्तुं लीला+धाम्ना अवतरति। अन्यत् किञ्चित् प्रयोजनं न।३। कच्चरे नॄन् दुर्बलान् दीनान् हीन+मतीन् ज्ञात्वा प्रेम्णा भक्ति+विधित्सया समुद्धर्तुं आविरासीत्।४।

पुराणांतरी वर्णन केलेले मत्स्य-कूर्मादि अवतार ऐकलेले आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या अंती आपण उल्लेखिलेले दोन अवतार ऐकण्यास मी उत्सुक आहे. तर ते अवतार व त्यांच्या इतर कथा विस्ताराने मला सांगाव्यात अशी प्रार्थना नामधारकाने केली आहे.१.

सिद्धमुनी म्हणाले, 'हे वत्सा तू हा प्रश्न फार चांगला विचारलास! त्या चित्ताचा मल घालवणाऱ्या आणि श्रोत्यांना तसेच वक्त्यालाही पापापासून शुद्ध करणाऱ्या त्या कथा आतां लक्ष देऊन ऐक.'२. आपल्या गीतेतील सुप्रसिद्ध प्रतिज्ञेनुसार (४:८) धर्माच्या रक्षणासाठी, साधूंच्या उद्धारासाठी आणि दुष्टांच्या निर्दलनासाठीच भगवंत लीलादेह धारण करून अवतरतात.

**परमेश्वर पक्षपाती आहे कां?** साधूंचा उद्धार करायचा आणि दुष्टांचा मात्र नाश करायचा याने परमेश्वरावर पक्षपात (**वैषम्य**) आणि दुष्टावा (**नैर्घृण्य**) यांचा आरोप करतां येत नाही. आई आपल्या बाळाचे कधी लाड करते तर आवश्यक तेव्हां त्याला मारतेसुद्धां. तसेच सर्वांच्या नियामक अशा परमेश्वराचेही आहे. लालन करतांना तसेच ताडन करतांनाही मातेच्या मनांत कारुण्यच असते तद्वतच जीवांना त्यांच्या पाप-पुण्यांचे फळ देण्यांत जीवांच्या अंतिम कल्याणाचेच विधान ईश्वर करत असतो. बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (३:२:१३) पुण्यवंत त्याने केलेल्या पुण्यकर्माने

**पीठापुरे पूर्वदेशे राजा नाम द्विजो वधूः । सुमतिस्तावुभौ नित्यं श्रीदत्तार्चनतत्परौ ।।५।।**

पूर्व+देशे पीठापुरे राजा नाम द्विजः, वधूः सुमतिः, तौ उभौ श्रीदत्त+अर्चन+तत्परौ।५।

होतो तर पापी त्याच्याच पापकर्मानि तसा होतो. भगवद्गीतेत श्रीकृष्ण म्हणतात, जो ज्या प्रकारे मला भजतो त्यानुसारच मी त्याला भजतो (४:११). 'वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् तथा हि दर्शयति।' (२:१:३४) या ब्रह्मसूत्राचा हाच अभिप्राय आहे. त्याचे अन्य कांहीही प्रयोजन नाही कारण भगवंत पूर्णकाम आहेत.३.

मलदूषित कलियुगांतील (**कच्चरे**) मानव दरिद्री, मंदबुद्धी आणि ब्रह्मचर्यादि साधनांचे बल नसलेले आहेत हे जाणून त्यांच्या उद्धारासाठीच परम वात्सल्याने आपल्या विद्या आणि शक्तीसहित, परिपूर्ण ज्ञान-बल-वीर्य धारण करून, परमात्मा शुद्धसत्त्वगुणसंपन्न चिन्मय देहाने भक्तिमार्गाच्या स्थापनेसाठी अवतरला.४.

पूर्वेकडील (आंघ्रांतील) पीठापूर नांवाच्या गांवी आपळराजा नांवाचा ब्राह्मण होता. त्याची पत्नी सुमती नांवासारखी उत्तम बुद्धी असलेली होती. दोघेही पतिपत्नी दत्तभक्त असून ते नित्य दत्तप्रभूंच्या पूजेत रमलेले असत.५.

**एकदैत्यास्य वेश्मार्थि-वेषेणान्नं स्म याचते । दत्तः श्राद्धेऽकृतेप्यस्मै श्राद्धाहेऽन्नं ददौ सती ।।६।।**
**तदा ज्ञात्वा स तद्भावं सर्वात्मा भगवान्विभुः । प्रीतः स्वरूपं साध्व्यै तत्करं धृत्वा व्यदर्शयत् ।।७।।**
**स्रक्कुण्डीडमरूच्छूल-शङ्खचक्रधरोऽब्रवीत् । व्याघ्रचर्मावृतस्त्र्यास्यो जटिलो भस्मभूषितः ।।८।।**
**मातर्द्विजेष्वभुक्तेषु श्राद्धाहेऽन्नं त्वयार्पितम् । हव्यकव्यादबुद्ध्या मे तत्तुष्टोस्मि वरं वद ।।९।।**

एकदा अस्य वेश्मे अर्थि+वेषेण एत्य दत्तः अन्नं याचते स्म। श्राद्ध+अहे श्राद्धे अकृते अपि सती अस्मै अन्नं ददौ।६। तदा सः सर्व+आत्मा भगवान् विभुः तत्+भावं ज्ञात्वा प्रीतः साध्व्यै तत्+करं धृत्वा स्वरूपं व्यदर्शयत्।७। स्रक्+कुण्डी+डमरु+उत्+शूल+शङ्ख+चक्र+धरः व्याघ्र+चर्म+आवृतः त्रि+आस्यः जटिलः भस्म+भूषितः अब्रवीत्।८। '(हे) मातः श्राद्ध+अहे द्विजेषु अभुक्तेषु त्वया हव्य+कव्य+अद+बुद्ध्या मे श्राद्ध+अन्नं अर्पितम्। तत् तुष्टः अस्मि। वरं वद।'९।

एकदा त्यांच्या घरी ब्राह्मण याचकाच्या रूपाने येऊन दत्तप्रभूंनी अन्नाची याचना केली. त्या दिवशी घरी श्राद्ध होते आणि ब्राह्मण जेवायचे होते. तरीही अतिथीला विन्मुख पाठवूं नये असा विवेक करून सुमतीने भिक्षेकऱ्याच्या वेषांतील दत्तात्रेयांना अन्न दिले.६. तेव्हा सर्वांतर्यामी, सर्वव्यापी भगवंतांनी तिची ती भक्ती ओळखून अत्यंत प्रेमाने मातृभावाने त्या साध्वीचा हात धरून तिला आपल्या त्रैमूर्त्यात्मक रूपाचे दर्शन दिले.७. तीन मुखे आणि सहा हात असलेल्या प्रभूंनी खालच्या दोन हातांत माला-कमंडलु, मधल्या दोन हातांत डमरू-शूल आणि वरच्या दोन हातांत शंख-चक्र धारण केले होते. भस्माने भूषविलेल्या तनूवर व्याघ्रांबर लपेटले होते आणि मस्तकावर जटाभार रुळत होता. ते दत्तदेव त्या सतीला म्हणाले,(८) 'माई! श्राद्धाच्या दिवशी देवांच्या आणि पितरांच्या निमित्ताने निमंत्रित केलेल्या ब्राह्मणांचे भोजन होण्याआधीच हाच हव्य आणि कव्य यांचा भोक्ता विष्णू आहे (**हव्य+कव्य+अदः**) अशा बुद्धीने (भावाने) ते अन्न मला अर्पण केले त्याने मी संतुष्ट झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे! कितीही दुर्लभ मागणे असले तरी मी ते पुरवीन.'९.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**धन्यास्मि सर्वे पितरोऽपि धन्या यद्यो भवान्योगिमनोविदूरः ।**
**भूत्वाद्य मे दृग्विषयोऽपि पित्र्यं स्वाद्वाददेऽन्नं किमुताधिकं सत् ।।१०।।**
**सृष्ट्यादिहेतो जगतोऽसि भक्त-पुमर्थकल्पद्रुरतोऽर्पयाशु ।**
**मे सुप्रजस्त्वं जनसेवि मातरित्युक्तसम्बोधनसिद्धिपूर्वम् ।।११।।**
**एवं श्रुत्वात्रिवद्याच्ञां प्राह भूयात्तथैव ते । पुत्रस्ते भविता मादृक्तदुक्तिं मा तिरस्कुरु ।।१२।।**
**इत्युक्त्वाऽन्तर्दधे दत्तः सापि वेश्मैत्य हर्षिता । पत्ये शशंस तत्सर्वमुभावपि ननंदतुः ।।१३।।**

ब्राह्मणी उवाच। धन्या अस्मि। सर्वे पितराः अपि धन्याः यत् योगी+मनः+वि+दूरः भवान् मे दृक्+विषयः (अभूत्), (तथा) पित्र्यं स्वादु अन्नं अपि आददे। उत किं अधिक सत्?।१०। (हे) जगतः सृष्टि+आदि+हेतो! (हे) भक्त+पुं+अर्थ+कल्प+द्रुः जन+सेवि! 'मातः' इति उक्त+ संबोधन+सिद्धि+पूर्वं मे सु+प्रजस्त्वं आशु अर्पय।११। एवं अत्रिवत् याच्ञां श्रुत्वा प्राह, 'तथा एव ते मा+दृक् पुत्रः भविता। तत्+उक्तिं मा तिरस्कुरु'।१२। इति उक्त्वा दत्तः अन्तर्दधे। सा अपि हर्षिता वेश्मे एत्य तत् सर्वं पत्ये शशंस। उभौ अपि ननन्दतुः।१३।

त्या देवदुर्लभ दर्शनाने भारावून गेलेली ब्राह्मणी सद्गदित कंठाने बोलूं लागली. 'मी धन्य झाले! माझे सर्व पितर धन्य झाले!! योग्याच्या मनांपासूनही विशेषच दूर असणारे आपण आज माझ्या दृष्टीसमोर आलां. इतकेच नाही पितरांसाठी सिद्ध केलेले रुचकर अन्न ग्रहण केलेत! यापेक्षा अधिक सद्भाग्य ते काय?'१०. जगताची उत्पत्ती-स्थिती-संहार आपल्यापासूनच आहेत. भक्तांच्या पुरुषार्थासाठी आपण कल्पवृक्षाप्रमाणे आहांत. आपण 'आई' अशी जी हांक मारलीत तिला सत्यत्व येण्यासाठी (आपल्यासमान) सर्व लोकांना पूज्य अशा सुपुत्राचे मातृत्व मला शीघ्र द्या!११. अत्रिऋषींच्या मागण्यासारखीच ही तिची मागणी ऐकून दत्तप्रभू म्हणाले, 'तसेच होईल! तुला माझ्यासारखाच पुत्र होईल. मात्र त्याच्या वचनाचे तू कधीही उल्लंघन करूं नकोस!'१२. एवढे बोलून दत्तप्रभू अंतर्धान पावले. ती आनंदित झालेली सुमतीही घरांत आली आणि तिने यजमानांना सर्व हकीकत सांगितली. दोघेही हर्षनिर्भर झाले.१३.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**मयापराद्धमद्यान्नं दत्तं श्राद्धेऽकृतेप्यहो । दत्तात्रेयाय तन्नाथ क्षन्तुमर्हस्यशेषतः ॥१४॥**

॥ विप्र उवाच ॥

**पित्रर्थं भोजयित्वान्नैर्यैर्द्विजान्विष्णवेऽर्प्यते । कर्माभूत्स स्वयं तद्भुक्तत्कृतं सत्सुदुष्करम् ॥१५॥**
**रूपान्तरेण मध्याह्ने दत्तोऽटत्यर्थिवत्स्वकान् । उद्धर्तुं भगवांस्तस्मात्तदार्च्यो नान्यथाप्यते ॥१६॥**
**तस्माद्भद्रे कृतं भद्रं धन्ये नः पावितं कुलम् । वरोऽपि दुर्लभो लब्धो लोकस्यापि हितं यतः ॥१७॥**

ब्राह्मणि उवाच। 'अहो नाथ! अद्य श्राद्धे अकृते अपि दत्तात्रेयाय अन्नं दत्तम्। मया अपराद्धम्। तत् अशेषतः क्षन्तुं अर्हसि'।१४। विप्र उवाच। 'यैः अन्नैः पितृ+अर्थं द्विजान् भोजयित्वा (तत्) कर्म विष्णवे अर्प्यते, सः स्वयं तत्+भुक् अभूत्। सत्सु दुष्करं कृतम्।१५। दत्तः मध्याह्ने स्वकान् उद्धर्तुं रूपान्तरेण अर्थिवत् अटति। तस्मात् भगवान तदा अर्च्यः। अन्यथा (तथा) न आप्यते।१६। तस्मात् (हे) भद्रे, भद्रं कृतम्। नः कुलं पावितम्। वरः अपि दुर्लभः प्राप्तः। यतः लोकस्यापि हितम्'।१७।

सुमती म्हणाली, 'हे नाथ, श्राद्ध केलेले नसतांही श्राद्धीय अन्न दत्तात्रेयांना देऊन मी मोठाच अपराध केला आहे. आपण त्यासाठी क्षमा करावी!'१४. 'पितरांप्रीत्यर्थ केलेले जे चतुर्विध अन्न ब्राह्मणाना जेववून ते कर्म नंतर विष्णूलाच अर्पण करायचे असते. त्याच भगवान विष्णूंनी ते प्रत्यक्ष खाल्ले. हे अतिशय कठीण (किंवा मोठ्यांनाही कठीण) असे महान कर्म तू केलेले आहेस.१५. माध्याह्न काळी भगवान दत्तप्रभू याचकाच्या रूपाने भक्तांचा उद्धार करण्यासाठी फिरत असतात. त्या वेळी त्यांचे भिक्षा वाढून पूजन केले पाहिजे. अशा दुपारच्या वेळी केलेल्या अन्नदानाने त्यांची जशी कृपा प्राप्त होते तशी भजनपूजनादि अन्य साधनांनीही होत नाही. एवढ्यासाठी ही अन्नदानरूपी भगवत्सेवा अवश्यमेव करावी. माध्याह्नकाली आलेल्या अतिथीला अवश्य यथाशक्ती अन्न वाढावेच.१६. तेव्हां हे भाग्यवती, तूं हे पुण्याईचेच कार्य केले आहेस. आमचे कुल तू पावन केले आहेस. तसेच जो दुर्लभ वर तू मिळवला आहेस तो केवळ आपलेच नव्हे तर सर्व लोकांचेही हित करणारा आहे. तुझ्या निमित्ताने भगवान दत्तात्रेयांचाच अवतार भूतलावर होणार आहे!'१७.

**इत्युक्त्वा लौकिकं श्राद्धं शेषान्नेनाकरोद् द्विजः । साप्यथो गर्भिणी भूत्वा कालेऽसूतामुमप्यजम् ।।१८।।**
**मर्त्याकृतिं तदोद्वीक्ष्य तं दैवज्ञा जगुर्द्विज । ततपुण्यौघकल्पद्रु-फलं लब्धं सुदुर्लभम् ।।१९।।**
**अयं हि साक्षाद्भगवान्दत्तात्रेय इवार्चितः । अवतीर्णोऽत्र भक्त्यर्थमित्युक्त्वा ते मुदं ययुः ।।२०।।**

इति उक्त्वा द्विजः शेष+अन्नेन लौकिकं श्राद्धं अकरोत्। अथ सा अपि गर्भिणी भूत्वा काले, अजम् अपि अमुम्, असूत।१८। तदा मर्त्य+आकृतिं तं उद्वीक्ष्य दैवज्ञाः जगुः। (हे) द्विज, सुदुर्लभं ततः+पुण्य+ओघः+कल्प+द्रुः+फलं लब्धम्।१९। साक्षात् भगवान् दत्तात्रेय इव अर्चितः अयं (बालकः) हि अत्र (तव) भक्त्यर्थं अवतीर्णः (लक्ष्यते)। इति उक्त्वा ते मुदं ययुः।२०।

खरे तर श्राद्धासाठी केलेले अन्न साक्षात दत्तप्रभूंनाच समर्पण करून त्यांचीच प्रीती संपादन केल्यावर श्राद्ध सुसंपन्न झालेच होते. दत्तकृपेने ज्ञानी झालेल्या राजा आणि सुमती यांना हे कळतही होते. तरी पण ज्ञानी जसा आचरण करतो त्याचाच कित्ता इतर अज्ञानी लोक गिरवतात म्हणून गीतेच्या आदेशानुसार लोकसंग्रहासाठी त्या ब्राह्मणाने उरलेल्या अन्नाने ब्राह्मण जेववून श्राद्धाचा विधी पूर्ण केला. विष्णूला निवेदन केलेल्या अन्नाने अन्य देवतांची पूजा करूं नये असे स्मार्त मत असले तरी भागवत मताने आधी विष्णूला नैवेद्य दाखवून मगच अन्य देवतांना दाखवावे असाच विधी सांगितला आहे. पुढे त्या विप्रस्त्रीला गर्भ राहिला आणि यथाकाल दहाव्या महिन्यात जन्ममरणादि विकाररहित अशा ह्या वरद भगवंताला जन्म दिला.१८. मानवरूपधारी त्या प्रभूला पाहून - त्याचे जन्मकाळाचे ग्रहमान बघून, (आपळराजाने बोलावलेले) ज्योतिषी म्हणाले, 'विप्रवरा, खरोखर, तुझ्या पूर्वपुण्याईच्या वाढलेल्या कल्पवृक्षाचे अत्यंत दुर्लभ असे हे फळ तुला मिळाले आहे!१९. हा बाळ साक्षात् भगवान् दत्तात्रेयांसारखा पूज्य तुझ्या घरी तुझ्या भक्तीमुळेच अवतरला आहे असे आम्हाला वाटते.' असे बोलून बाळाच्या पत्रिकेतील शुभ आणि उच्चीचे ग्रह पाहून तेही आनंदित झाले.२०.

**श्रीपादः स्वङ्किताङ्घ्रित्वान्नाम्नोक्तः पितृलौल्यतः । स्वङ्गैरृद्धिं पुपोषारं सौरांश्वाप्तेः शशीव सः ।।२१।।**
**संस्कृतेनोपनीतेन स्वयं त्रय्यपि पाठिता । स्वोद्वाहार्थं समुद्युक्तः पितानेन निवारितः ।।२२।।**

सु+अङ्कित+अङ्घ्रि+त्वात् श्रीपादः इति नाम्ना उक्तः। पितृ+लौल्यतः अरं सु+अङ्गैः सौर+अंशु+आप्तेः शशि इव ऋद्धिं पुपोष।२१।
संस्कृतेन (तथा) उपनीतेन अनेन स्वयं त्रयी पाठिता अपि। स्व+उद्वाह+अर्थं समुद्युक्तः पिता अनेन निवारिता।२२।

वज्र, अंकुश, ध्वज, पद्म इत्यादि शुभ चिह्नांनी शोभणाऱ्या पायांवरून त्याचे नांव श्रीपाद असे ठेवण्यांत आले. **श्री** या शब्दाचे शोभा, संपत्ती आणि पद्म असे अर्थ होतात. मातापित्यांच्या संगोपनाने लवकरच श्रीपाद सूर्यकिरणांनी व्यापलेल्या चंद्रासारखा सर्वांगांनी वाढू लागला. भारतीय परंपरेनुसार चंद्रमंडल हे जलमय आहे. त्या आकाशस्थ चंद्रावर पडलेले सूर्याचे किरण परावर्तित झाल्याने रात्रीचा अंधार नाहीसा होतो. एखाद्या अंधाऱ्या घरांत आरशावर पडलेल्या सूर्याच्या किरणांनी ते घर उजळून निघावे तसेच हे आहे. शुक्ल पक्षांत सूर्य आणि चंद्र यांच्यातील अंतर कमी होत जाते आणि सूर्याचे किरण वाढत्या प्रमाणांत चंद्रमंडलाला व्यापतात. त्यामुळे चंद्रबिंब जसे वाढत जाते तसा मातापित्यांच्या संगोपनाने श्रीपाद वाढूं लागला असा भावार्थ.२१. श्रीपादाचे जातकर्मापासून सर्व शास्त्रविहित संस्कार आपळराजाने केले आणि मुंजही केली. मुंज झाल्यावर खरे तर वेद आणि शास्त्रांचे अध्ययन करावयाचे असते. पण अवतारी श्रीपादाला त्या सर्वांचे स्वयंभूच ज्ञान असल्याने ऋक्, यजुः आणि साम या वेदत्रयीचे तसेच आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त या कर्मत्रयीचे त्यानेच इतरांना शिक्षण द्यायला आरंभ केला. यथाकाल श्रीपाद विवाहाला योग्य झालेला पाहून त्याच्या लग्नाच्या दृष्टीने राजा ब्राह्मणाने प्रयत्न आरंभिले. ते पाहून श्रीपादांनी मात्र त्यांना विरोध केला.२२.

**।। श्रीपाद उवाच ।।**

**मया प्रव्रजतोद्वाह्या योगश्रीरेव नापरा । ममैव सुलभा सा तु यतः श्रीवल्लभोऽस्म्यहम् ।।२३।।**
**इत्युक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वोभौ साश्रुलोचनौ । ऊचतुस्त्वयि याते क्व जीवावोऽब्जा इवाम्बुनि ।।२४।।**

श्रीपाद उवाच। 'प्रव्रजतः मया योग+श्रीः एव उद्वाह्या, न अपरा। मम एव सा सुलभा, यतः श्री+वल्लभः अस्मि'।२३। इति उक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वा स+अश्रु+लोचनौ उभौ ऊचुः। 'त्वयि याते क्व जीवावः? अम्बुनि (याते) अब्जा (मत्स्याः) इव (मरिष्यावः)।२४।

**गृहस्थाश्रमाची आवश्यकता -** आपळराजांनी केलेले प्रयत्न हे श्रुती आणि स्मृतींच्या आज्ञाना अनुसरूनच होते. मनुस्मृतींत (३:२) ब्रह्मचर्याश्रमांत एक वा दोन वेदांचे अध्ययन करून गृहस्थाश्रम स्वीकारावा असे सांगितले आहे. तैत्तिरीय उपनिषदांतही (१:११:१) वेदाध्ययन झाल्यावर, 'आचार्यांना धनाने - गुरुदक्षिणेने प्रसन्न करून प्रजेचा तंतू तोडूं नकोस' म्हणजेच विवाह करून पुत्रलाभासठी प्रयत्न करण्याचाच उपदेश केला आहे. याचे कारण जन्माला येणारा प्रत्येक ब्राह्मण देव, ऋषी आणि पितर अशा तीन ऋणांसहच येतो (तैत्तिरीय संहिता ६:३:१०). स्वाध्याय (वेदाध्ययन) करून, अनुरूप स्त्रीशी विवाह करून आणि यज्ञयागादींचे अनुष्ठान करून, ऋतुकाली पत्नीशी समागम करून ऋणत्रयांपासून मुक्त व्हावे. क्वचित् पुत्रोत्पत्तीला कांही प्रतिबंध येत असेल तर पुत्रकामेष्टी करून त्या दिशेने प्रयत्न करण्याचीही शास्त्राची आज्ञा आहे. निपुत्रिकाला (स्वर्गादि) लोक मिळत नाहीत असेही सांगितले असतांना श्रीपादवल्लभांनी त्यांना प्रतिबंध कां केला या प्रश्नाचे उत्तर पुढील श्लोकांत देत आहेत.

**श्रीपादांची भूमिका -** अध्यात्मयोगाला साह्यभूत होणाऱ्या श्रेयरूपा - कल्याणकारी लक्ष्मीचा मला अंगीकार करायचा आहे म्हणून मी संन्यास घेतो आहे. कर्ममयी दुसरी जी प्रेयरूपा संपत् तिच्या अंगीकारानेही अंतःकरणशुद्धीद्वारा दैवी संपत् मिळेलच असे म्हटले तर त्यांत कर्माच्या बंधनात अडकण्याचा धोका आहे.

**त्वं साक्षाद्भगवान्विष्णुः पुत्रत्वेनाप्यतीन्द्रियः । प्राक्पुण्यैर्गोचरीभूतः कुतोऽकाब्धौ जहासि नौ ॥२५॥**

'त्वं साक्षात् भगवान् विष्णुः अति+इन्द्रियः अपि प्राक्+पुण्यैः पुत्रत्वेन गोचरीभूतः। नौ अक+अब्धौ कुतो जहासि?'।२५।

कठोपनिषदाच्या उपदेशानुसार (१:२:१) श्रेयाच्या अंगीकाराने कल्याण होते तर प्रेयाच्या अंगीकाराने अधोगती होते. किंवा असाही अर्थ करतां येईल कीं वेदांनी चित्तशुद्धीसाठी सांगितलेली ऋग्वेदादिरूपा अपरा श्री मला स्वीकारायची नाही कारण ते साधन मला आधीच प्राप्त झालेले आहे. त्यामुळे माझ्यासारख्या अधिकारसंपन्नालाच लाभणाऱ्या 'श्रेयोरूपा संपत्ती'चाच मी स्वीकार करणार आहे. त्यामुळेच माझे 'श्रियेचा वल्लभ' असे नांव आहे. ह्याचा भावार्थ असा आहे की कर्मकाण्डांतील विधी आणि निषेध प्रतिपादणाऱ्या श्रुती संसारांत आसक्त असणाऱ्या लोकांना उद्देशून सांगितल्या आहेत; आसक्तिरहित साधकांना नव्हेत. लैंगिक सुख, मांसाशन आणि मदिराप्राशन यांच्याकडे स्वाभाविक ओढ असणाऱ्यांना विशिष्ट प्रसंगी, विशिष्ट प्रकारेच त्यांचे सेवन करण्याची शास्त्राची केवळ अनुज्ञा आहे. याला परिसंख्या असे म्हणतात. यज्ञांतला हुतशेष म्हणूनच थोडे मांस किंवा सुरा घ्यायला किंवा स्वतःच्या पत्नीशीच, ऋतुकाळांतच समागम करण्याचे (आश्वलायन श्रौतसूत्र २:१६,२२-२७) विधान आहे. पराशर स्मृतीत (४:१३) ऋतुकाळांत पत्नीजवळ न जाण्याने भ्रूणहत्येचा दोष लागतो असे सांगितले आहे. हा दोष नावडती म्हणून किंवा द्वेषामुळे भार्येची उपेक्षा करणाऱ्यांसाठी आहे, विरक्ताला नाही हे ध्यानांत घेतले पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) ह्याच परमात्म्याचे ज्ञान प्राप्त करण्याच्या इच्छेने पूर्वीच्या ऋषिमुनींनी संन्यास घेतला. संततीची इच्छा सोडली. ते म्हणतात, संतती घेऊन आम्हाला काय करायचे आहे? त्यांच्यापासून न आम्हांला हा आत्मा प्राप्त होईल न हा लोक! पुत्रैषणा, वित्तैषणा आणि लोकैषणा ह्यांचा त्याग करून ते भिक्षेकरी झाले.२३. असे बोलून घर सोडून निघालेल्या त्या श्रीपादवल्लभाला पाहून त्याच्या आईवडिलांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. ते म्हणाले, 'तू आम्हांला सोडून गेल्यावर आम्ही कसे जगूं? पाण्याविना मासोळ्यांसारखे आम्ही मरून जाऊं.' (२४) आपण साक्षात् भगवान विष्णु आहांत. अतीन्द्रिय असूनही आमच्या पूर्वपुण्याईमुळे पुत्र या नात्याने आम्हांला दर्शन दिलेत. आतां आम्हांला असे शोकसागरांत टाकून कसे जातां?'२५.

**पङ्ग्वन्धार्भेक्षणान्नित्यं भवपाशविमोचनी । स्मृतिः प्रवयसोर्नौ ते हरे दूरतरा भवेत् ।।२६।।**
**इति वाक्यं सकारुण्यं श्रुत्वारं भ्रातृमस्तके । सुखाकरं निजकरं तद्वात्सल्याद्दधौ हरिः ।।२७।।**
**तदैव सहसा तौ तु स्वङ्गौ ज्ञौ च बभूवतुः । लीलाविहारिणीदन्नो चित्रं भगवतीश्वरे ।।२८।।**

(हे) हरे, नित्यं पङ्गु+अन्ध+अर्भ+ईक्षणात् प्रवयसोः नौ ते भवपाशविमोचनी स्मृतिः दूरतरा भवेत्।२६। इति सकारुण्यं वाक्यं श्रुत्वा तत्+वात्सल्यात् हरिः सुख+आकरं निजकरं अरं भ्रातृमस्तके दधौ।२७। तदा एव तौ सहसा सु+अङ्गौ ज्ञौ च बभूवतुः। लीलाविहारिणि भगवति ईश्वरे इदं न चित्रम्।२८।

'दुःख, दैन्य, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या हरी, (तूं गेल्यावर) सतत एक आंधळा आणि एक पांगळा अशा ह्या मुलांकडे पहाणाऱ्या आम्हांला वृद्धापकाळी मृत्युरूप संसारपाशांतून सोडवणारी तुझी स्मृतीसुद्धां आम्हांला दुरावेल.' वार्धक्य आणि मृत्यू ह्या दोन्ही कठीण प्रसंगी आम्ही तुझ्यावांचून निराधार होऊं असा भावार्थ.२६. यापुढील श्लोक सिद्धमुनी सांगत आहेत.

असे त्यांचे दीनवाणे वचन ऐकून त्यांच्यावरील प्रेमाने दुःखहारक श्रीपादांनी सुखाची जणूं खाणच असा आपला आनंदप्रेषक हात लगेच आपल्या बंधूंच्या मस्तकावर ठेवला.२७. श्रीपादांच्या हाताचा स्पर्श होतांच तत्काळ त्या दोघां भावांचे अपंगत्व एकदम नाहीसे झाले. आंधळ्याला उत्तम दृष्टी आली आणि पांगळ्याला छान चालतां येऊं लागले. एवढेच नाही तर ते ज्ञानसंपन्न झाले. लीलेने मनुष्यदेह धारण केलेल्या सर्वसमर्थ ईश्वराच्या संबंधांत ह्यांत कांहीच आश्चर्य (**चित्रं**) नाही.२८.

**मताप्यदृष्टपूर्वं तद्रूपमाश्चर्यवत्तदा । दृष्ट्वा दत्तोदितं स्मृत्वा प्राह गद्गदया गिरा ।।२९।।**
**माया दुरत्यया दैवी तव तन्मोहिता भृशम् । सत्वं रूपं न जानेऽतस्त्वयि मे पुत्रकल्पना ।।३०।।**

तदा माता अपि अदृष्टपूर्वं तत् रूपं आश्चर्यवत् दृष्ट्वा दत्त+उदितं स्मृत्वा (च) गद्गदया गिरा प्राह।२९। 'तव दैवी माया दुरत्यया। भृशं तत्+मोहिता (अहं तव) सत्त्वं रूपं न जाने। अतः त्वयि मे पुत्रकल्पना'।३०।

**आत्मदर्शन -** अशा रीतीने आपल्या वडील भावांना स्वस्थ केल्यावर श्रीपादांनी आपल्या आईला आपल्या स्वरूपाचे दर्शन दिले. ते पूर्वी न पाहिलेले स्वरूप पाहून ती स्तिमित झाली. खरे तर परमेश्वराची दोन स्वरूपे नाहीतच. पण हे सच्चिदानंदस्वरूप पूर्वी विक्षेप आणि आवरण ह्या मायेच्या दोन शक्तींच्या प्रभावाने, राहूने झांकलेल्या सूर्यासारखे, दिसले नव्हते - अनुभवाला आले नव्हते. ह्यांतून श्रीपादांनी आपल्या मातेला अपरोक्ष आत्मानुभूती दिली असे सूचित होते. गीतेत (२:२९) 'आश्चर्यवत् पश्यति' असेच आत्मदर्शनाचे वर्णन आहे. भ.पू. शंकराचार्यांनी हे आत्मदर्शन अदृष्टपूर्व असल्याने आश्चर्याला कारण होते असे टीकेत म्हटले आहे. त्याचाच इथे श्रीस्वामिमहाराजांनी अनुवाद केला आहे. कठोपनिषदातंही 'आश्चर्यो वक्ता' असे म्हटले आहे. सुमतीला आधी श्रीदत्तप्रभूंचे सगुण दर्शन झाले होते. हे त्यापेक्षां वेगळे निर्गुणसाक्षात्कारात्मक दर्शन झाले. ह्या अनुभवानंतर तिला त्या पूर्वीच्या दर्शनाच्या वेळी दत्तप्रभूंचे. 'तुला होणाऱ्या मुलाचे वचन मोडूं नकोस,' हे सांगणे आठवले आणि ती सद्गदित कंठाने म्हणाली.२९. 'तुझी अलौकिक अद्भुत माया खरीही म्हणतां येत नाही आणि खोटीही म्हणतां येत नाही ('सदसद्विलक्षण') अशी असल्याने दुस्तर आहे. त्यामुळे मी पार मोहून गेले! ('मुह्' या धातूचा अर्थ मनांत अवास्तव कल्पना उगवणे.) त्यामुळे तुझे वास्तव स्वरूप मला जाणतां आले नाही; आणि तू माझा मुलगा आहेस अशी विपरीत कल्पना माझ्या मनांत घर करून राहिली.'३०.

**ब्रह्माण्डलेखा यत्कुक्षौ स मत्कुक्षिज इत्यदः । जगद्विडम्बनं दत्त माया मां नावृणोतु ते ।।३१।।**

**।। श्रीपाद उवाच ।।**

**अदो रूपं त्वया दृष्टं नित्यं हृद्यवधारय । मायासिन्धुं द्रुतं तीर्त्वा मत्सायुज्यं गमिष्यसि ।।३२।।**
**शतायुषौ सुतौ तेऽपि पितृशुश्रूषणोत्सुकौ । विद्याश्रीपुत्रपौत्राढ्यौ मातर्मंक्षु भविष्यतः ।।३३।।**

यत् कुक्षौ ब्रह्मांडलेखा स मत्+कुक्षिजः इति अदः जगत् विडंबनं। (हे) दत्त! ते माया मां न आवृणोतु।३१। श्रीपाद उवाच। अदः त्वया दृष्टं रूपं नित्यं हृदि अवधारय। मायासिंधुं द्रुतं तीर्त्वा मत्+सायुज्यं गमिष्यसि।३२। (हे) मातः ते सुता अपि शतायुषौ, पितृशुश्रूषणोत्सुकौ, विद्या+श्री+पुत्र+पौत्र+आढ्यौ मंक्षु भविष्यतः।३३।

'ज्याच्या उदरांत अगणित ब्रह्मांडांच्या पंक्ती सहज सामावल्या आहेत तो माझ्या पोटीं जन्मला हे जगाला दाखवण्याचे केवळ नाटक आहे. हे दत्तप्रभो, तुझी माया माझ्या(बुद्धी)वर आवरण न टाको.'

**मायेची आवरणशक्ती -** मायेच्या दोन शक्ती आहेत. आवरणशक्ती आपल्या (आत्म)स्वरूपाला झांकून ठेवते, आणि विक्षेपशक्ती नसलेला, मिथ्या प्रपंच दाखविते. जन्ममरणादिरूप ह्या संसाराचे कारण मुख्यत्वे **असत्त्वावरण** आणि **अभानावरण** हेच आहेत असत्त्वावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्वच नाही अशी भावना. ही अध्यात्मशास्त्राच्या श्रवणमननाने दूर होते. अभानावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्व मनापासून पटले तरी तसा प्रत्यक्ष अनुभव न येणे. निदिध्यासनाने (ध्यानाने) हे जाऊन आत्मसाक्षात्कार होतो. विक्षेप म्हणजे देहादिकांच्या अध्यासाने खऱ्या वाटणाऱ्या जगतासंबंधीच्या कल्पना आणि विकार. हा विक्षेप संसाराचे कारण नाही. अंधुक प्रकाशांत दोरीवर भासणारा साप हे अज्ञान आहे. त्यांत दोरी न दिसणे हे अभानावरण आहे. ती दोरी तिथे नाहीच असे वाटणे हे असत्त्वावरण आहे.

**स्तुतोऽपि भ्रातरौ प्राह प्रव्रजाम्यधुना सदा । संसेव्यौ पितरौ तौ हि गृहिसत्पुत्रदैवतम् ।।३४।।**

**इत्युक्त्वा त्रिः परिक्रम्य प्रणम्य पितरौ स तु । जगाम तदनुज्ञातः काशीं च बदरीवनम् ।।३५।।**
**साधूनुद्धर्तुकामोऽथ गोकर्णं सज्जनाश्रयम् । ययौ यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम् ।।३६।।**

स्तुतःभ्रातरौ अपि प्राह, 'अधुना अहं प्रव्रजामि, पितरौ सदा संसेव्यौ। तौ हि गृहि+सत्+पुत्र+दैवतम्।'।३४। इति सः तु उक्त्वा पितरौ त्रिः परिक्रम्य तत्+अनुज्ञातः काशीं च बदरीवनं जगाम।३५। साधून् उद्धर्तु+कामः सत्+जन+आश्रयं गोकर्णं ययौ, यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्।३६।

## ।।इति श्रीगुरुचरिते श्रीपादावतारो नाम पञ्चमोध्यायः।।५।।

ह्या दोन्ही आवरणांमुळेच तिथे नसलेला साप दिसूं लागतो. तो पाहून निर्माण झालेले भय, शरीराला सुटलेला कांप इत्यादि विक्षेप होत. दिव्याच्या प्रकाशाने दोरी दिसणे हे ज्ञान होय. दोरी पाहिल्यावरसुद्धां छातीतली धडधड, शरीराचा कंप इत्यादि विक्षेप थोडा काळ राहतात. ते तसे राहिले तरी दोरीचे झालेले ज्ञान जात नाही आणि सापाचा भासही पुन्हा होत नाही. ते विक्षेप जावेत म्हणून वेगळे उपाय करण्याची आवश्यकता नाही. ते आपोआपच शमतात. ह्या अभिप्रायानेच सुमती फक्त मायेच्या आवरणापासूनच दूर ठेवण्याची प्रार्थना करीत आहे. श्रीस्वामिमहाराजांच्या 'सत्यज्ञानानंत' या अभंगांत हा अभिप्राय फार छान मांडलेला आहे. तो इथे उद्धृत करीत आहे.

**सत्यज्ञानानंत तुज वदे वेदांत । हें शोधितों होउनी दांत शांत समाहित ।।१।।**

**मालासर्पभ्रांत ध्वांती दीपें शांत । होय तेवीं हा वेदांत शमवी जीवभ्रांत ।।२।।**

**साप नोहे माळा स्पष्ट दिसली डोळां । घातली कंपे मिठी गळां न सुटे कांही वेळां ।।३।।**

**आवरणाची स्थिती न वसे विज्ञानांती । विक्षेपाची स्वरूपशांती होय प्रारब्धांतीं ।।४।।**

**जीव त्वन्मय होतां आवरणाची न वार्ता । स्वाधिष्ठानी तत्त्वें मिळतां विक्षेपान्त दत्ता ।।५।।**

**ऐसा वेदांतार्थ जाणुनी शोधूं स्वार्थ । मग तूं दत्ता भेटसी आम्हां इतर श्रम हा व्यर्थ ।।६।।**३१.

हे तूं पाहिलेले रूप सतत हृदयांत धारण कर म्हणजे तू हा मायासागर लवकरच पार करून माझे सायुज्य प्राप्त करशील. ह्या तुला अनुभवाला आलेल्या आत्मस्वरूपाचे तूं नित्य मनन आणि निदिध्यासन करून तें सत्त्वप्रधान हृदयांत स्थिर कर असा आदेश श्रीपादांनी दिला आहे. **दृष्टं** म्हणजे वृत्तिव्याप्तीने अनुभवलेले आत्मस्वरूप. वृत्तीव्याप्ती आणि फलव्याप्ती अशा दोन प्रकारांच्या ज्ञानांचा विचार आपण चौथ्या अध्यायांत (४:५५) केला आहे. आत्मानुभूती झाली तरी ती चित्तांत स्थिर होण्यासाठी अभ्यासाची आणि काळाची आवश्यकता आहे. एकदां केलेल्या उपदेशाने ज्ञान स्थिर झाले नाही तर त्याची उजळणी करावी ह्या ब्रह्मसूत्राचा (४:१:१) दाखला इथे श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. अशा रीतीने ज्ञानाचे प्रतिबंध (असंभावना, संशयभावना आणि विपरीतभावना) दूर होऊन माझ्या सच्चिदानंद स्वरूपाशी तूं एकरूप होशील.३२. तसेच हे माते, तुझे हे दोन्ही पुत्र शतायुषी होतील, आई-वडिलांची (तुमची) सेवा करण्यांत तत्पर असतील आणि विद्या, संपत्ती, पुत्र, पौत्र इत्यादीनी समृद्ध होतील.३३.

**दैवतें मायबाप -** श्रीपादांनी मातेला उपदेश केल्यावर त्यांच्या ज्येष्ठ बंधूंनीही त्यांचे स्तवन केले. त्यांना श्रीपाद म्हणाले, 'आज मी घर सोडून संन्यस्त जीवनाचा अंगीकार करीत आहे. तुम्ही दोघांनी यापुढे आईवडिलांची निरलस सेवा करावी. कारण गृहस्थाश्रमांत गुणी सुपूताची मुख्य दैवते मातापिताच आहेत. तशी वेदांची 'मातृदेवो भव. पितृदेवो भव' आज्ञाच आहे.' यांत मुख्यतः गृहस्थाश्रमाचाच उल्लेख एवढ्यासाठी आहे की ब्रह्मचारी गुरूंच्या अधीन असतो आणि संन्याशाने सर्व ममत्वाचा त्याग केलेला असतो.३४. वर **'पितरौ'** या शब्दाने आई आणि वडील असा दोघांचाही बोध होतो. आईवडिलांना तीन वेळां सव्य प्रदक्षिणा करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन श्रीपाद काशी आणि बदरिकाश्रमाला जायला निघाले.३५. काशी आणि बदरी यांची यात्रा करून श्रीपाद साधूंच्या उद्धाराच्या इच्छेने, सज्जनांना आश्रयभूत

अशा गोकर्णाला गेले, जिथे साक्षात् गणेशाने शैव लिंगाची स्थापना केली आहे.३६.

**समारोप -** श्राद्धाचा स्वयंपाक श्राद्धाच्या पूर्वीच इतरांना देणे हे तसे विकर्मच मानावे लागेल. पण भुकेला अतिथी घरी आलेला असेल तर त्याला अन्न नाही दिले तरीही ते विकर्मच होईल. *'स इद्भोजो यः'* इत्यादि मंत्रातून (ऋग्वेद १०:११७:३-४) अन्नदानाचे महत्त्व वर्णन केले आहे. अशा दुविधेत सांपडलेल्या सुमतीने दान न देण्यापेक्षां दान देणे बरें अशा भावात्मक निर्णय घेतला आणि *'अतिथिः सर्वरक्षकः'* या वचनाला अनुसरून हा अतिथी विष्णुस्वरूप आहे अशा ईश्वरबुद्धीने अतिथीला अन्न दिल्याने त्या सत्त्वगुणसंपन्न ब्राह्मणीला श्राद्धाच्या अनंतपट फळ लाभले. यावरून असे दिसते की सत्कर्माला प्रवृत्त होणारा बंधातून मुक्त होतो. अन्यथा कर्माची गती गहन आहे हेच खरे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा पांचवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## अथ षष्ठोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**शैवं तत्र गणेशेन कुतो लिङ्गं प्रतिष्ठितम् । सज्जनाश्रयमेतत्तु कथं श्रावय मे मुने ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**विष्णवाज्ञया गणेशेन रावणात्तं प्रतिष्ठितम् । शैवं लिङ्गं ततोऽत्रासन्देवाः संतोऽप्यदः शृणु ।।२।।**

नामधारक उवाच। तत्र गणेशेन शैवं लिङ्गं कुतः प्रतिष्ठितम्? एतत् तु सत्+जन+आश्रयं कथम्? (हे) मुने, मे श्रावय।१। सिद्ध उवाच। गणेशेन विष्णु+आज्ञया रावण+आत्तं शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्। ततः देवाः संताः अपि अत्र आसन्।२।

**रावणाला फसवून गणेशें केले लिंग स्थापन ।**
**सहाव्यांत चांडालीचा उद्धार आणि गोकर्णवर्णन ।।१।।**

कर्माचे तत्त्व जाणणाऱ्या सात्त्विक भक्तावर ईश्वराचा प्रसाद होतो हे पांचव्या अध्यायांत दाखविल्यावर कर्मतत्त्व न जाणणाऱ्या असात्त्विक (आसुरी) भक्तावर देवाची कृपा झाली तरीही ती विघ्नांच्या द्वारा कशी निष्फळ होते ते ह्या अध्यायांत सांगितले आहे.

मागील अध्यायाच्या शेवटी आपण त्या गोकर्ण क्षेत्रांत गणेशाने शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली असे म्हणालांत ते कसे काय? तसेच हे गोकर्ण साधु जनांचा आश्रय आहे ते कोणत्या प्रकारे?१. सिद्धांनी उत्तर दिले - भगवान विष्णूंच्या आज्ञेने रावणाकडून घेतलेल्या भगवान शंकरांच्या आत्मलिंगाची गणपतीने ह्या क्षेत्रांत प्रतिष्ठापना केली. तेव्हांपासून ब्रह्मदेवादि देव तसेच साधूसंत इथे राहू लागले.२.

**भजन्तीं मृन्मयं लिङ्गं कैलासाप्त्यै तु रावणः । प्रसूं निषिध्य सेशाद्रिं श्रीमानाहर्तुमाययौ ।।३।।**

**हठात्कैलासमुद्धर्तुमुत्कमोजस्विनं शिवः । लोकोत्पातभिया गौर्या स्तुतोऽगाधोऽवरोधयत् ।।४।।**

**सोऽपि मृत्यून्मुखीभूतो ध्यानतुष्टेन शम्भुना । समुद्धृतो दशमुखस्तत्तुष्ट्यै साध्वगायत ।।५।।**

कैलास+आप्त्यै मृत्+मयं लिङ्गं भजन्तीं प्रसूं निषिध्य श्रीमान् स+ईश+अद्रिं आहर्तुं आययौ।३। हठात् कैलासं उद्धर्तुं उत्कं ओजस्विनं लोक+अत्पात+भिया गौर्या शिवः स्तुतः अग+अधः अवरोधयत्।४। सः अपि मृत्यु+उन्मुखी+भूतः ध्यान+तुष्टेन शम्भुना समुद्धृतः। दश+मुखः तत्+तुष्ट्यै साधु अगायत्।५।

एकदा रावणाची आई मृत्तिकेचे लिंग करून त्याची शंकराप्रमाणे पूजा करत असलेली रावणाला दिसली. आपल्यासारखा ऐश्वर्यसंपन्न मुलगा असतांना आईने यःकश्चित् मातीच्या लिंगाची पूजा करावी हे त्याला सहन झाले नाही. तिला तसे न करण्याला सांगून तिच्यासाठी साक्षात् कैलास पर्वतच भगवान शंकरासह आणण्याच्या उद्देशाने तो तिथे गेला.३. कैलासाजवळ पोंचतांच महाबली रावणाने आपल्या आसुरी वृत्तीला अनुसरून अख्खा पर्वतच पायापासून उचलायला आरंभ केला. त्यामुळे कैलासावर भूकंपासारखे उत्पात होऊं लागले. तेथील सर्व लोक घाबरून शंकरांकडे आले. तेव्हां पार्वतीने ध्यानमग्न शंकरांची स्तुती केली आणि कैलासावर आलेले हे संकट निवारण्याची प्रार्थना केली. तेव्हां शंकरांनी तो पर्वत डाव्या हातानेंच दाबून धरला. त्या वेळी रावण त्याच्या खाली सांपडला.४. शंकरांनी डाव्या हाताने सहज दाबल्यानेसुद्धां तो दहा तोंडांचा रावण मरणोन्मुख झाला आणि ध्यान करून शंकरांकडे दयेची याचना करूं लागला. तेव्हां प्रसन्न झालेल्या सदाशिवांनी त्याला कैलासाखालून सुखरूप बाहेर काढले. मग तो रावण शंकरांना प्रसन्न करण्यासाठी सुमधुर गाऊं लागला.५.

**सुस्वरं साङ्गरागाढ्यं माधुर्यं स्वर्णमुत्तमम् । कालोचितं जगौ गीतं ततानद्धघनारयुक् ।।६।।**
**प्राणिमात्रमनोहारि दिव्यं गानं स शंकरः । प्रीतोऽब्रवीत्साधु गीतं रावणेष्टं वरं वृणु ।।७।।**

**।। रावण उवाच ।।**

**पूर्मेऽन्यदुर्लभा हैमी श्रीर्दासी दैवविद्विधिः । मृत्युर्दासोऽनुगा देवास्तन्मे न क्वापि दुर्लभम् ।।८।।**

सु+स्वरं स+अङ्ग+राग+आढ्यं माधुर्यं स्वर्णं उत्तमं काल+उचितं तत+आनद्ध+घन+आर+युक् गीतं जगौ।६। सः शंकरः प्रीतः अब्रवीत्। (हे) रावण प्राणि+मात्र+मनः+हारि दिव्यं गानं साधु गीतम्। इष्टं वरं वृणु।७। रावण उवाच। मे हैमी पूः अन्य+दुर्लभा, श्रीः मे दासी, विधिः दैव+वित्, मृत्युः दासः, देवाः अनुगाः। तत् मे क्व अपि दुर्लभं न।८।

बळाच्या जोरावर कैलास मिळणे शक्य नाही हे कळतांच रावणाने भगवान शंकरांची गानप्रियता लक्षांत घेऊन आपल्या संगीताने त्यांना प्रसन्न करण्याचा उद्यम आरंभिला. सप्तस्वरांच्या सुरेल रचनेने विविध रागरागिणींनी युक्त गोड गायन तो करूं लागला. तो उत्तम कवी असल्याने त्याने यमक-अनुप्रासादि शब्दालंकारांनी आणि अर्थालंकारांनी युक्त अशी गीते रचून तो गाऊं लागला. आपली दहा मुखे आणि वीस हात यांचा उपयोग करून त्याने वीणादि तंतुवाद्ये ('तत'), पखवाजादी चर्मवाद्ये ('आनद्ध'), झांजा, टाळ इत्यादि घन वाद्ये आणि बांसरी, सनई इत्यादि फुंकून वाजवायची ('आर') वाद्ये अशी चारही प्रकारची वाद्ये साथीला घेतली. आपल्या आंतडीचे तंतुवाद्य करून त्याने वाजविले असा इतरत्र उल्लेख आहे.६. मानव आणि देवच नव्हे तर सर्वच प्राण्यांच्या मनाला लुभवणारे ते गायन ऐकून ते आशुतोष शंकर भगवान प्रसन्न होऊऩ त्याला प्रेमाने म्हणाले, रावणा! हे तुझे अलौकिक गायन उत्तम झाले. तुला हवा तो वर मागून घे.७. रावण शंकरांना वर मागतांना आधी प्रौढी करतो आहे. 'माझी सोन्याची लंका शत्रूला अभेद्य आहे, साक्षात् लक्ष्मी माझी दासी आहे, ब्रह्मदेव माझा ज्योतिषी आहे, मृत्यू माझ्या आज्ञेवांचून कुणाचे प्राण घेऊं शकत नाही, सगळे देव माझे अनुचर आहेत. तेव्हां मला दुर्लभ असे या त्रैलोक्यांत काय आहे?'८.

**मात्राज्ञप्तोऽस्मि कैलासमानेतुं भो त्वयान्वितम् । देहि मे वरणीयार्थं भगवन्वरदोऽसि चेत् ।।९।।**

**।। शिव उवाच ।।**

**कैलासेन तु किं साध्यं प्राणलिङ्गं ततोऽधिकम् । गृहाणानेन मादृक्त्वं पूस्ते कैलासवद्भवेत् ।।१०।।**
**स्थाप्यते यत्र तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति । तस्मात्स्थापय पुर्येव धृत्वेदं कर्म मा कुरु ।।११।।**
**इत्युक्त्वा तत्करे लिङ्गं भक्त्याकृष्टमना ददौ । रावणोऽप्यतिसन्तुष्टो ययौ लङ्कां खलाग्रणीः ।।१२।।**

भो! मात्रा त्वया अन्वितं कैलासं आनेतुं आज्ञप्तः अस्मि। भगवन् वरदः असि चेत् वरणीय+अर्थं मे देहि।९। शिव उवाच। कैलासेन तु किं साध्यम्? ततः अधिकं प्राण+लिङ्गं गृहाण। अनेन त्वं मादृक्, ते पूः कैलासवत् भवेत्।१०। इदं यत्र स्थाप्यते तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति। तस्मात् पुरि एव स्थापय। इदं धृत्वा कर्म मा कुरु।११। भक्त्या+आकृष्ट+मना (शिवः) इति उक्त्वा तत्+करे लिंगं ददौ। खलाग्रणीः रावणः अपि अतिसंतुष्टः लङ्कां ययौ।१२।

आपल्याला स्वतःसाठी कांहीच मागायचे नाही अशी प्रस्तावना करीत रावण आपल्या आईचे नांव पुढे करीत आहे. मला मातेने आपल्यासहित कैलास आणण्याची आज्ञा केली आहे. आपल्याला वर द्यायचाच असला तर हाच वर (आपल्यासहित कैलास) द्या.९. तेव्हां भगवान शंकर त्याला म्हणाले, कैलास घेऊन काय मिळणार? त्यापेक्षां हे माझे प्राणलिंगच घे! त्याच्यामुळे तूं माझ्यासारखा होशील आणि तुझी लंकानगरीच कैलास होईल.१०. हे माझे आत्मलिंग तूं ज्या ठिकाणी ठेवशील तिथेच कायम स्थिर होईल. यासाठी तू ते आपल्या नगरीत पोचल्यावरच खाली ठेव. तसेच हे हातांत धरून कोणतेही कर्म करूं नकोस.११. भक्तीला भुललेल्या शंकरांनी असे बोलून ते आपले प्राणलिंग त्या रावणाच्या हातांत ठेवले. रावण म्हणजे लोकांना आक्रोश करायला लावणारा ('लोकान् रावयति') म्हणून त्याला दुष्टशिरोमणी म्हटले आहे. ते लिंग हातांत पडतांच त्याचा हर्ष गगनांत मावेना. त्याने तडक लंकेची वाट घरली.१२.

**ज्ञात्वैतन्नारदो योगी शशंस ब्रह्मणेऽपि सः । विष्णवे द्राक् त्रयोऽपीशं गत्वोचुः किं कृतं त्विदम् ।।१३।।**
**बद्धाः सर्वेऽमरा येन प्रसिद्धो लोककंटकः । राक्षसः प्राणिमात्राशी त्वत्समः स कथं कृतः ।।१४।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्याकृष्टं मनो मेऽद्य तेन गानादिना ततः । दत्तं लिङ्गं मया हर्षात्स नाद्यापि पुरं गतः ।।१५।।**
**व्याजेनैव खलो जय्य इत्युक्त्वा प्रेरयन्मुनिम् । विघ्नेशं च तदा विष्णुर्लिङ्गाहरण हेतवे ।।१६।।**

योगी नारदः एतत् ज्ञात्वा ब्रह्मणे शशंस। सः अपि विष्णवे (शशंस)। त्रयः अपि ईशं गत्वा ऊचुः इदं तु किं कृतम्?१३। येन सर्वे अमराः बद्धाः सः प्रसिद्धः लोककंटकः प्रणिमात्र+आशी राक्षसः त्वत्+समः कथं कृतः?१४। शिव उवाच। तेन गानादिना भक्त्या मे मनो अद्य आकृष्टम्। ततः मया हर्षात् लिंगं दत्तम्। (किंतु) सः अद्यापि पुरं न गतः।१५। तदा विष्णुः खलः व्याजेनैव जय्यः इति उक्त्वा मुनिं विघ्नेशं च लिंग+आहरण+हेतवे प्रेरयत्।१६।

योगाच्या परिपक्वतेने त्रिकालज्ञानी नारदांनी हे जाणले आणि मनोगतीने ही सर्व लिंगदानाची हकीकत जाणली. मनोवेगाने ब्रह्मलोकाला जाऊन आपल्या पिताजींच्या कानी घातली. ब्रह्मदेवसुद्धां नारदांना घेऊन तांतडीने वैकुंठाला गेले आणि त्यांनी विष्णूंना सर्व प्रकार कथन केला. मग ते तिघेही केवळ संकल्पानेच कैलास पर्वतावर शंकरांसमोर उपस्थित झाले आणि म्हणाले, रावणासारख्या दुष्टाला आत्मलिंगाचे दान आपण कसे बरे केले?१३. ज्याने सर्व देवांना बंदीखान्यांत टाकले आहे, जो तिन्ही लोकांना उपद्रव देणारा कांटा आहे असा सर्व प्राण्यांची संपत्ती आणि देहसुद्धां खातो असा राक्षस तुम्ही आपल्यासारखा कसा केला?१४. शंकर म्हणाले, 'त्याने गायनादि भक्तीने माझ्या मनाला भुरळ घातली. त्या आनंदांत मी त्याला आत्मलिंग दिले खरे! पण अजून तो लंकेला पोंचला नाही.' यांतून शंकर असे सुचवीत आहेत की तो लंकेला पोंचण्यापूर्वी माझ्या वरदानाला बाध न आणतां कांही उपाय तुम्ही करूं शकतां.१५. त्या वेळी विष्णूंनी विचार केला कीं ह्या दुष्टाला जिंकण्यासाठी साम-दाम-दंडादींचा उपयोग नाही. त्याला कपटानेच जिंकतां येईल. असे म्हणून त्यांनी नारदमुनीना रावणाला उशीर करायला, आणि विघ्नराज गणपतीला विघ्न करायला आणि रावणाकडून लिंग काढून घेण्यासाठी पाठविले.१६.

**नारदस्त्वञ्जसा योगी गत्वाग्रे रक्षसोऽब्रवीत् । आयातोऽसि कुतो ब्रूहि रावण द्राक् क्व गच्छसि ।।१७।।**
**रावणस्त्वब्रवीद् ब्रह्मन् तोषयित्वाद्य शंकरम् । लब्ध्वा लिङ्गं पुरं यास्ये पश्येदं शैवमुत्तमम् ।।१८।।**
**तत्प्रेक्ष्योचे मुनी रक्षः शृण्वेकः सैरभाशनः । मृगयायां हतो ब्रह्महरीशैर्दुर्धरो मृगः ।।१९।।**
**तैस्त्रीण्याप्तानि लिङ्गानि तच्छृङ्गेभ्यस्तदात्मवत् । मतान्यैशं त्विदं दैवाल्लब्धं सायुज्यदं विभोः ।।२०।।**
**सोऽप्याह नाद्य श्रोतव्यं गन्तव्यं सत्वरं मुने । क्वातीत्य संध्यां यासीति मुनिनोक्त उपाविशत् ।।२१।।**

योगी नारदः तु अञ्जसा रक्षसः अग्रे गत्वा अब्रवीत्। (हे) रावण कुतः आयातः असि? तथा द्राक् क्व गच्छसि? (मे) ब्रूहि।१७। रावणः तु अब्रवीत्। (हे) ब्रह्मन्! अद्य शंकरं तोषयित्वा लिंगं लब्ध्वा पुरं यास्ये। इदं उत्तमं शैवं (लिंगं) पश्य।१८। तत् (लिंगं) प्रेक्ष्य मुनी ऊचे। (हे) रक्षः शृणु। ब्रह्म+हरि+ईशैः मृगयायां एकः सैरभ+अशनः दुर्धरः मृगः हतः।१९। तैः तत्+शंगेभ्यः त्रीणि लिङ्गानि आप्तानि। (तानि तैः) आत्मवत् मतानि। इदं तु ऐशं विभोः सायुज्यदं दैवात् लब्धम्।२०। सः अपि आह, 'मुने न अद्य श्रोतव्यं, सत्वरं गन्तव्यम्।' ' संध्यां अतीत्य क्व यासि?' इति मुनिना उक्तः (सः) उपाविशत्।२१।

प्रथम नारदमुनी योगगतीने तात्काळ त्या राक्षसापुढे गेले आणि त्याला म्हणाले, 'अरे रावणा! तूं कुठून येतोयस? आणि एवढ्या घाईने कुठे चाललास? मला जरा सांग!'१७. रावण उत्तरला, 'मुनिवर्य! आज मी भगवान शंकरांना प्रसन्न करून त्यांचे आत्मलिंग मिळविले आहे. ते घेऊन मी माझ्या नगरीला जातो आहे. हे अत्युत्कृष्ट शैव लिंग पहा.'१८. ते लिंग पाहून नारदमुनी त्याला म्हणाले, 'हे राक्षसराजा, ह्याचा इतिहास ऐक. ब्रह्मा, विष्णू आणि शंकर ह्या तिघांनी शिकारीत एक रानरेड्यांचा आहार करणाऱ्या एक दुर्धर हिंस्र पशूची शिकार केली.१९. त्यानी त्या पशूच्या शिंगांपासून तीन लिंगे घेतली. ती आपल्यासमान मानून धारण केली. हे तर भगवान शंकरांचे लिंग आहे. हे तुला शिवसायुज्य प्राप्त करून देईल. तुला मोठ्या सद्भाग्याने हे मिळाले आहे.२०. तो (रावण) परत म्हणाला, 'मुनिराज, मला लवकर गेले पाहिजे. तुमची कथा ऐकायला मला आतां वेळ नाही.' 'अरे, संध्येची वेळ झाली आहे. संध्या सोडून कुठे चाललास?' असे नारदांनी त्याला टोंकल्यावर तो संध्येला बसला.२१.

**अत्रान्तरे गणेशोऽपि वर्णिलिङ्ग्याययौ स तम् । करे कृत्वाऽब्रवीत्कोऽसि कस्य पुत्रः क्व गच्छसि ।।२२।।**
**सोऽप्याहोमाशंकरौ मे पितरौ देयमस्ति ते । किं ताभ्यां भो न चेत्पाणिं मोचयाशु बिभेम्यहम् ।।२३।।**
**रावणोऽप्याह नादेयं ताभ्यां लिङ्गं क्षणं वह । हैमीं मे गौरवाल्लङ्कां दर्शयामि सुखं वस ।।२४।।**
**बालेनैवोरु लिङ्गं नो धार्यतेऽपि न गम्यते । लङ्का घोरेत्यपि प्रोक्तः स तमाश्वास्य तद्ददौ ।।२५।।**
**दत्तलिङ्गोऽब्धितीरे स सांध्यां कर्तुं क्रियां ययौ । बालोऽप्याह त्रिराहूय नागते स्थापयामि कौ ।।२६।।**

अत्रान्तरे वर्णि+लिङ्गी गणेशः अपि आययौ। सः तं करे कृत्वा अब्रवीत्। 'कः असि?', 'कस्य पुत्रः?', 'क्व गच्छसि?'२२। सः अपि आह। 'उमा-शंकरौ मे पितरौ। ताभ्यां ते देयं अस्ति किम्? न चेत्, भोः आशु पाणिं मोचय। अहं बिभेमि।'२३। रावणः अपि आह, 'ताभ्यां न आदेयम्। क्षणं लिङ्गं वह। (ततः तुभ्यं) गौरवात् मे हैमीं लंकां दर्शयामि। (तत्र त्वं) सुखं वस।२४। 'बालेन एव(मया) ऊरु लिंगं नो धार्यते। घोरा लंका अपि न गम्यते। इति प्रोक्तः सः (रावणः) तम् आश्वास्य तत् (लिंगं) ददौ।२५। दत्तलिंगः सः सांध्यां क्रियां कर्तुं अब्धितीरे ययौ। बालः अपि आह, '(त्वां) त्रिः आहूय (त्वया) नागते लिंगं कौ (भुवि) स्थापयामि'।२६।

इतक्यांत ब्रह्मचारी वेषाने गणेशही तेथे आले. त्याने (रावणाने) त्याला प्रेमाने हाताला धरून विचारले, बाळा, तूं कोण? कुणाचा पुत्र आहेस? कुठे चाललास?२२. मुंज्याच्या वेषांतील गणपतीही त्याला म्हणाला, 'उमा माझी माता आहे आणि शंकर माझे पिता. ते तुझे कांही देणे लागतात कां? नसेल तर हे राक्षसा, लवकर माझा हात सोड. मला तुझी भीती वाटते!'२३. असे बोलणाऱ्या त्याला रावण त्याला म्हणाला, 'नाही रे! तुझ्या आईवडिलांकडून माझें कांही येणे नाही. हे माझे लिंग थोडा वेळ धर. तुला माझी सोन्याची लंका दाखवीन. तूं तिथे सुखाने राहा.'२४. 'मला पोराला हे जड लिंग धरवणार नाही; (तुझी) लंका भीषण वाटते' असे कुरकुरणाऱ्या गणेशाला कसेबसे समजावून ते लिंग (बळेच) त्याच्या हातांत दिले.२५. अशा रीतीने लिंग गणेशाच्या हातीं ठेवून तो रावण संध्याकर्म करण्यासाठी समुद्रकिनारी गेला. बालगणेशाने त्याला बजावले, 'तुम्हांला तीन वेळां हांका मारून तुम्ही आला नाही तर हे भारी लिंग मी जमिनीवर ठेवीन.'२६.

**इत्युक्त्वा किञ्चिद्विश्रम्य स्वः पश्यत्सु सुरेषु तम् । त्रिराहूय हरिं स्मृत्वा लिङ्गं सोऽस्थापयद्भुवि ।।२७।।**
**सोऽपेत्य स्थापितं दृष्ट्वा सन्ताड्यार्भं भुजैस्तु तत । उद्धर्तुमैच्छत्क्ष्मा तेन चकम्पेऽप्यचलं तु तत् ।।२८।।**
**महाबलेश्वर इति लिङ्गं तत्संज्ञितं ततः । गोकर्णवद्बलोद्धृत्या जातं तत्संज्ञितं स्थलम् ।।२९।।**
**कैलासोऽयं क्षितौ साक्षाद्यत्रेशः परिवारयुक् । सदा जागर्त्यतस्तत्र स्थिता देवर्षिसज्जनाः ।।३०।।**
**देवर्ष्यसुररक्षोनृ-तिर्यग्भिर्यत्र शंकरात् । लब्धोऽभीष्टो वरो नान्यदितः सत्पावनं स्थलम् ।।३१।।**

इति उक्त्वा सः किंचित् विश्रम्य स्वः सुरेषु पश्यत्सु तं (रावणं) त्रिः आहूय, हरिं स्मृत्वा लिंगं भुवि अस्थापयत्।२७। सः अपि एत्य (लिंगं) स्थापितं दृष्ट्वा अर्भं संताड्य भुजैः तत् (लिंगं) उद्धर्तुं ऐच्छत्। तेन क्ष्मा चकम्पे। तत् (लिंगं) तु अचलं (जातम्)।२८। तत् लिंगं महाबलेश्वर इति संज्ञितम्। ततः बल+उद्धृत्या गोकर्णवत् जातम्। तत् (गोकर्ण)संज्ञितं स्थलं (लिगं च जातम्)।२९। अयं क्षितौ साक्षात् कैलासः (अस्ति)। यत्र ईशः परिवारयुक् सदा जागर्ति। अतः तत्र देव+ऋषि+सज्जनाः स्थिताः।३०। यत्र देव+ऋषि+असुर+रक्षः+नृ+तिर्यग्भिः अभीष्टः वरः लब्धः। इतः अन्यत् सत्पावनं स्थलं न।३१।

एवढे बोलून गणेशाने थोडा वेळ वाट पाहून, (कौतुक पहायला जमलेल्या) स्वर्गस्थ देवांच्या साक्षीने त्याला (रावणाला) तीन वेळां बोलावून विष्णुस्मरणपूर्वक लिंग भूमीवर स्थापन केले.२७. त्या असुरानेही परत येऊन लिंग खाली ठेवलेले पाहून त्या मुलाला टोले देऊन आपल्या भुजांनी तें लिंग उचकटायचा प्रयत्न केला. त्याने भूमीसुद्धा कम्पित झाली; पण ते लिंग मात्र अचलच राहिले.२८. त्यावरून त्या लिंगाला महाबलेश्वर असे नांव पडले! तसेच जोराने उचकटल्याने ते गाईच्या कानाच्या आकाराचे झाले. त्यामुळे ते स्थळ आणि लिंग गोकर्ण या नांवाने ओळखले जाऊं लागले.२९. हा भूमीवर साक्षात् कैलासच आहे जिथे भगवान सदाशिव सपरिवार भक्तांच्या कामना पूर्ण करीत सदैव जागे असतात. म्हणजेच म्हणून तिथे देवता, ऋषी आणि साधुसंत यांचाही नित्य वास असतो.३०. जिथे देव, ऋषी, असुर, राक्षस, मानवच काय पण प्राण्यांनाही ईप्सित वराची प्राप्ती झाली आहे अशा या गोकर्णासमान शीघ्र पावन करणारे स्थान दुसरे नाही.३१.

**शृणु किञ्चिद्वसिष्ठेन शप्तोऽज्ञानकृतागसः । राक्षसत्वं द्वादशाब्दं प्राप मित्रसहो नृपः ।।३२।।**
**तदाहनद् द्विजं तत्स्त्रीः शापान्ते नृप पूर्ववत् । भूत्वाप्येष्यसि मच्छापाद्रतेऽन्तमिति तं जगौ ।।३३।।**

शृणु किञ्चित्। अज्ञानकृत+आगसः मित्रसहः नृपः वसिष्ठेन शप्तः द्वादश+अब्दं राक्षसत्वं प्राप।३२। तदा द्विजं अहनत्। तत्+स्त्रीः तं जगौ, 'हे नृप! शापान्ते पूर्ववत् भूत्वा अपि मत्+शापात् रते (तव) अंतम्।'इति।३३।

सिद्ध मुनि नामधारकाला सांगत आहेत, 'जरा ऐक! इथे पुराणातील एका कथेचा संदर्भ आहे. एकदां मित्रसह नांवाच्या इक्ष्वाकु वंशांतील राजाने अरण्यातील एका राक्षसाचा वध केला. त्या राक्षसाच्या भावाने कपटाने राजाचा सेवक होऊन त्याची मर्जी संपादन केली आणि सूडासाठी योग्य संधीची वाट पाहूं लागला. एकदां आपल्या घरी आलेल्या वसिष्ठांना भोजनाचे आमंत्रण देऊन राजा कांही कार्यांत व्यस्त झाला असतां तिथे राक्षसाने वसिष्ठांचे रूप धरून जेवणासाठी मृगमांसाची मागणी केली. राजाने त्याप्रमाणे व्यवस्था केली. जेवायला वाढतांना त्या कपटवेषांतील राक्षसाने मृगमांसाऐवजी नरमांसच आणून वाढले. वसिष्ठ मुनींनी रागावून राजाला शाप दिला. 'आपण मागणी केल्यानुसार सर्व पाक केला असतांना हा उगीचच मला शाप दिलात. आतां मीसुद्धां आपणांस शाप देतो,' असे म्हणून राजानेही हातांत पाणी घेतले. एवढ्यांत त्याची राणी मध्ये पडली आणि राजाला प्रार्थनेने गुरुशापाच्या दुष्कर्मापासून परावृत्त केले. वसिष्ठांनाही ध्यानाद्वारे झालेला सर्व प्रकार लक्षांत आला. तेव्हा ते म्हणाले, माझा शब्द खरा होणारच; पण शापानुसार तू बारा वर्षे ब्रह्मराक्षस होऊन परत राजा होशील. तेव्हां राजाने हातांतले शापजल खाली सोडून दिले ते त्याच्या पायांवर पडले. त्यायोगें तो कल्माषपाद नांवाचा ब्रह्मराक्षस झाला.३२. त्या राक्षसावस्थेत असतांना राजाने अरण्यातील वाटेने जाणाऱ्या ब्राह्मण दंपतीपैकी पतीला, त्याची पत्नी सारखी काकुळतीने परावृत्त करीत असातांनाही, मारून खाऊन टाकले. त्या वेळी आपल्या पतीच्या अस्थी सांवडतांना ती ब्राह्मणी म्हणाली, 'अरे राजा! शापाचा काळ संपल्यावर जेव्हा तू पुनश्च राजा होशील तेव्हां स्त्रीशी समागम करतांच तुझा अंत होईल!'३३.

**अथैष पूर्ववद्भूत्वा स्वं राज्यं प्राप्य दुःखितः । स्मरातुरायै महिष्यै साध्वीशापं शशंस राट् ।।३४।।**
**ततः खिन्नावुभौ तीर्थ-यात्रासक्तौ यदृच्छया । आयान्तं गौतमं दृष्ट्वा सर्वं तस्मै शशंसतुः ।।३५।।**
**गौतमोऽप्याह भो मा भीर्गोकर्णेऽघौघहारिणि । कामिकल्पद्रुमे क्षेत्रे किं भवेद्ब्रह्महत्यया ।।३६।।**
**तीर्थानि सर्व तोयानि शैवलिङ्गानि ताः शिलाः । लिङ्गतीर्थमये तत्र दिव्ये किं दुर्लभं नृणाम् ।।३७।।**

अथ एष पूर्ववत् भूत्वा राज्यं प्राप्य दुःखितः कामातुरायै महिष्यै राट् साध्वी शापं कथयामास।३४। ततः उभौ खिन्नौ तीर्थ+यात्रा+सक्तौ यदृच्छया गौतमं आगतं दृष्ट्वा तस्मै सर्वं शशंसतुः।३५। गौतमः अपि आह, भो (राजन्), मा भीः। अघ+ओघ+हारिणि कामि+कल्पद्रुमे गोकर्णे क्षेत्रे (विद्यमाने) ब्रह्महत्यया किं भवेत्?३६। तत्र सर्व तोयानि तीर्थानि, ताः शिलाः शैवलिङ्गानि। तत्र लिङ्ग+तीर्थमये (क्षेत्रे) नृणां किं दुर्लभम्?३७।

बारा वर्षांनी राक्षसत्वाचा परिहार झाल्यावर तो पूर्वीप्रमाणे राज्यकारभार पाहूं लागला. पण ब्रह्महत्येचे पाप आणि त्या ब्राह्मणीचा शाप यांमुळे तो दुखीकष्टी असायचा. एकदां त्याची राणी कामातुर होऊन त्याच्याकडे आली असतांना तिला राजाने आपल्याला झालेला साध्वीचा शाप निवेदन केला.३४. तेव्हां दोघेही दुःखीकष्टी झाले आणि ब्रह्महत्येच्या परिमार्जनासाठी तीर्थयात्रेला निघाले. त्यावेळी स्वेच्छेने भूमीपर्यटण करणारे गौतम ऋषी त्यांना दिसले. त्यांचा यथोचित सत्कार करून त्या पतिपत्नींनी त्याना आपले दुःख निवेदन केले.३५. गौतमांनी राजाला धीर दिला. म्हणाले, ‘अरे राजा! गोकर्णासारखे पापांचे पुंज नष्ट करणारे आणि सकाम लोकांना कल्पवृक्षासारखे इष्ट देणारे क्षेत्र या भूतलावर असतांना ब्रह्महत्येचे काय भय धरतोस?३६. तिथे सर्वच जलाशय आणि जलप्रवाह तीर्थस्वरूप आहेत. महापापीसुद्धां ज्यांच्यायोगे तरून जातो (‘तीर्यते अनेन’) त्याला तीर्थ म्हणतात. तसेच तेथील सर्वच दगड-धोंडे ही अर्चनीय अशी शिवलिंगेच आहेत. अशा तीर्थ आणि लिंगांनी संपन्न असलेल्या त्या गोकर्ण क्षेत्रांत मानवांना दुर्लभ असे काय आहे?’ सर्व कांही सुलभच आहे. तीर्थांच्या दर्शन, स्पर्शन, स्नान, पान इत्यादींनी अंतःकरणाची शुद्धी होते. तसेच शिवलंगांच्या पूजेने आणि वंदनाने शंभुप्रसादाने चित्ताची एकाग्रता लाभते. अशा प्रकारे मोक्षसुद्धा सुलभच आहे, हेच इथे सुचविले आहे.३७.

**शृणु तत्र मया दृष्टा चण्डाल्येका मृता तु ताम् । शिवदूता विमानेन कैलासं नेतुमागताः ।।३८।।**
**मया पृष्टास्तु ते प्रोचुः प्राग्वृत्तं शृणु गौतम । प्राग्भवे विप्रकन्येयं बाल्येऽभूद्विधवा विधेः ।।३९।।**
**तन्वी कामपरा नित्यं युवसौन्दर्यमोहिता । वृत्वा कान्तं विशं भेजे सौपपत्यं रहोऽपि तत् ।।४०।।**
**जातं लोकप्रसिद्धं हि मलो नाच्छाद्यतेऽपि कैः । सम्बन्धिनस्तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं तदाऽभजन् ।।४१।।**
**ततो रेमेऽपशङ्कं सा पानासक्ता मदोद्धता । विशः कुटुम्बिनी भूत्वा कन्दर्पहतचेतना ।।४२।।**

शृणु। तत्र मया एका चण्डाली मृता दृष्टा। शिव+दूताः तां विमानेन कैलासं नेतुमागताः।३८। मया पृष्टाः तु ते प्रोचुः। (हे) गौतम, प्राक् वृत्तं शृणु। इयं प्राक् भवे विप्रकन्या। विधेः बाल्ये विधवा अभूत्।३९। सा तन्वी नित्यं कामपरा युव सौंदर्य मोहिता विशं कान्तं वृत्वा रहः औपपत्यं भेजे। तत्..।४०। (तत्) लोकप्रसिद्धं जातम्। मलः कैः अपि न आच्छादते। तदा सम्बन्धिनः तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं अभजन्।४१। ततो सा कन्दर्पहतचेतना विशः कुटुम्बिनी भूत्वा पानासक्ता मदोद्धता अपशङ्कं रेमे।४२।

'राजा मी प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत सांगतो ती ऐक. मी तिथे (गोकर्ण क्षेत्रांत) एक चांडाळीण मरतांना पाहिली. तर काय आश्चर्य, तिला कैलासावर नेण्यासाठी शिवदूत विमान घेऊन आले.'३८. मी त्यांना विचारल्यावर ते मला म्हणाले, 'अहो गौतम ऋषी, हिचा पूर्वीचा वृत्तांत ऐका. मागील जन्मी ही ब्राह्मणकन्या होती. दैवगतीने ती बालपणीच विधवा झाली.३९. ती रूपवती आणि सतत कामचिंतनाने तरुणांच्या सौंदर्याने मोहित होत असे. एकदां तिने एका गोऱ्यागोमट्या वैश्य तरुणासह व्यभिचाराने संबंध ठेवला. चोरून केले तरी ते दुष्कृत्य.४०. लोकांत प्रकट झालेच. पाप कुणाला (**कैः**) झांकून ठेवतां येत नाही. **कैः** म्हणजे पाण्याने मल (विष्टा) झांकतां येत नाही असाही अर्थ लावतां येईल. तेव्हा तिच्या नातेवाइकांनी तिला घराबाहेर काढून संसर्गदोषाच्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त घेतले.४१. मग तर कामविकाराने विवेकशून्य होऊन मद्याच्या आहारी जाऊन त्याच धुंदींत ती वैश्यासह राजरोस संसार करूं लागली.४२.

**प्रमत्ता सैकदा वत्सं मेषभ्रान्त्या निहत्य कम् । स्थापयित्वाऽत्तुमन्येद्युः शेषं पक्त्वा चखाद ह ॥४३॥**
**ज्ञात्वाऽथ गोशिरो जार-भीत्या निक्षिप्य तद्भुवि । व्याघ्रेणापहृतो वत्सः शिवेत्थं पर्यदेवयत् ॥४४॥**
**इत्याद्यवाच्यपापानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समम् । दारुणां दुर्गतिं भुक्त्वा जातेदृश्यघशेषतः ॥४५॥**
**जन्मतोऽस्या गलत्कुष्ठ आन्ध्ये सत्यपि रक्षिता । पितृभ्यां तावपि मृतौ ततोऽनाथा रुरोद सा ॥४६॥**
**संगत्य यात्रिकैः सत्रा माघे दैवादिहागता । क्षुधिता शिवरात्रौ सा ययाचेऽन्नं सुदुःखिता ॥४७॥**

एकदा सा प्रमत्ता मेष+भ्रांत्या वत्सं निहत्य कं अन्ये द्युः अत्तुं स्थापयित्वा शेषं पक्त्वा चखाद ह।४३। अथ गोशिरो ज्ञात्वा तत् जार+भीत्या भुवि निक्षिप्य 'शिव (शिव), वत्सः व्याघ्रेण अपहृतः' इत्थं पर्यदेवयत्।४४। (सा) इत्यादि अवाच्य पापानि कृत्यानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समं दारुणां दुर्गतिं भुक्त्वा अघशेषतः ईदृशी जाता।४५। अस्या जन्मतः गलत्कुष्ठम्। आन्ध्ये सति अपि (सा) पितृभ्यां रक्षिता। तौ अपि मृतौ। ततः अनाथा सा रुरोद।४६। दैवात् सा माघे यात्रिकैः सत्रा इह आगता। सा क्षुधिता सुदुःखिता शिवरात्रौ अन्नं ययाचे।४७।

एकदां दारू पिऊन तर्र असतांना तिने बकरा समजून गाईचे वांसरूंच कापले आणि डोके दुसऱ्या दिवशी खायला शिंक्यावर ठेवून बाकीचे शिजवून खाऊन टाकले.४३. सकाळी ते वांसराचे डोके पाहून, ते तिने जाराच्या भीतीने जमिनीत गाडून टाकले आणि 'देवा, देवा! वासरूं वाघाने धरून नेले हो!' असे म्हणून खोटेच रडूं लागली.४४. अशी जिभेवर आणण्यासही अनुचित अनेक दुष्कृत्ये करून मेल्यावर आपल्या संबंधितांसह दारुण नरकांत पिचून पापाचा भोग झाल्यावर उर्वरित पापामुळे ती ही अशी चांडाळाच्या घरी जन्म पावली.४५. हिला जारकर्माच्या फलस्वरूप हिचे शरीर जन्मतःच कुष्ठग्रस्त होते. तसेच गाईचे वांसरूं मारल्याने ती आंधळी होती. अशा अवस्थेत आईवडील होते तोंपर्यंत त्यांनी तिचा सांभाळ केला. त्यांच्या मृत्यूनंतर ती लाचार होऊन दुःखाकष्टांत कशीबशी जगूं लागली.४६. दैवयोगाने ती यात्रेकरूंच्या बरोबर माघ महिन्यात इथे (गोकर्ण क्षेत्रांत) आली. शिवरात्रीच्या दिवशी भुकेने कासावीस होऊन ती येणाऱ्याजाणाऱ्यांकडे खायला मागूं लागली.४७.

**जनैस्तदाशनाभावात्प्रसारितकरेऽर्पितम् । बिल्वमाघ्राय तत्याज मत्वाऽभक्ष्यं सुदुःखिता ।।४८।।**
**लिङ्गे त्यक्तं तु तत्पूजा श्रुतमह्नीशकीर्तनम् । उपवासोऽशनाभावाद् दुःखाज्जागरणं निशि ।।४९।।**
**एवं साङ्गं व्रतं चीर्णं तेन भूत्वा सुनिर्मला । मृताऽद्यात्र शिवाज्ञप्ताः स्म आनेतुमिमां द्रुतम् ।।५०।।**
**तैरित्युक्त्वाऽमृतं सिक्त्वा विमानाग्रे निधाय ताम् । जग्मुः कैलासं सहोत्थ-क्रियागतिरियं त्विह ।।५१।।**

तदा अशन+अभावात् (तस्याः) प्रसारित+करे अर्पितम् बिल्वं आघ्राय सा सुदुःखिता अभक्ष्यं मत्वा तत्याज।४८। लिङ्गे त्यक्तं तत् तु पूजा जाता। अह्नि ईश+कीर्तनम् श्रुतम्। अशन+अभावात् उपवासो (जातः)। निशि दुःखात् जागरणं (जातम्)।४९। एवं व्रतं सांगं चीर्णम्। तेन (सा) सुनिर्मला भूत्वा अद्य अत्र मृता। (वयं) इमां (कैलासं) आनेतुं शिव+आज्ञप्ताः स्म।५०। तैः इति उक्त्वा अमृतं सिक्त्वा तां विमान+अग्रे निधाय कैलासं जग्मुः। इयं तु इह सह+उत्थ+क्रिया+गतिः।५१।

तेव्हां (सगळ्यांना उपवास असल्याने) खाद्य वस्तूंच्या अभावी तिच्या पुढे केलेल्या हातावर कुणी तरी बेलाचे पानच टाकले. तिने ते हुंगून पाहतां खाण्यायोग्य नाही असे जाणून चरफडत टाकून दिले.४८. ते लिंगावर जाऊन पडले. तीच पूजा झाली! दिवसभर देवाचे भजन कांनांवर पडले. खायला कांहीच न मिळाल्याने उपास घडला. रात्रभर दुखाने तळमळत झोंप कसली येणार?४९. ‘असे तिच्याकडून हे शिवरात्रीचे व्रत, शिवार्चन, उपोषण, जागरण, कीर्तन या सर्व अंगासहित, यथासांग पार पडल्याने तिच्या पापांचे क्षालन होऊन ती अतीव शुद्ध झाली आणि आजच्या ह्या पवित्र दिवशी या पावन क्षेत्री हिला मृत्यू आला. त्यामुळे भगवान महादेवांनी आम्हांला हिला कैलासावर घेऊन येण्याची आज्ञा केली आहे.’५०. त्यांनी असे सांगून तिच्यावर अमृत शिंपून तिला विमानांत पुढे बसविले आणि कैलासाला निघून गेले. असे बोलून गौतम राजाला म्हणाले, ‘ही ह्या भूलोकांत सहज घडलेल्या कर्माने प्राप्त होणारी सामान्य गती आहे.५१.

**विदुषस्तु फलाधिक्यं ज्ञात्वेदं गच्छ मुच्यसे । तच्छ्रुत्वा द्राङ् नृपो गत्वा क्षणान्मुक्तो बभूव ह ।।५२।।**
**गोकर्णमीदृशं क्षेत्रं सत्तमं सज्जनाश्रयम् । अतस्तत्रैव तस्थौ हि श्रीपादः साधुजीवनः ।।५३।।**
**मोचयित्वा सतोऽब्दांस्त्रीँस्तत्रोषित्वा गतागतात् । कृष्णातटे कुरुपुरं प्राप्यादृश्योऽभवत्स तु ।।५४।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे गोकर्णवर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ।।६।।**

विदुषस्तु फलाधिक्यं इदं ज्ञात्वा गच्छ। तत् श्रुत्वा नृपः (गोकर्णं) द्राक् गत्वा क्षणान् मुक्तो बभूव ह।५२। ईदृशं सत्तमं सज्जन+आश्रयं गोकर्णं क्षेत्रम् (अस्ति)। अतः साधु+जीवनः हि श्रीपादः तत्र एव तस्थौ।५३। सतः गतागतात् मोचयित्वा तत्र त्रीन् अब्दान् उषित्वा कृष्णातटे सः कुरुपुरे प्राप्य तु अदृश्यो अभवत्।५४।

'जाणून कर्म केलेल्या कर्माचे फळ यापेक्षां अधिकच आहे हे समजून, हे राजा तूं गोकर्णाला जा.' ज्ञानी पुरुषाला कर्माचे अधिक फळ मिळते याचा अर्थ ते मोक्षपर्यवसायी होते. यावर कुणी असा निष्कर्ष काढला की ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने मोक्ष मिळतो तर ते बरोबर नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:१६) *'कर्मणा पितृलोको विद्यया देवलोक'* असे ज्ञानयोग आणि कर्मयोगाचे भिन्न फळ सांगितले आहे. त्यामुळे एकच साधक त्या दोन्हींचे एकाच वेळी अनुष्ठान करूं शकत नाही. कर्मयोगाने ज्ञानाचा अधिकार प्राप्त करून घेऊन मग कर्मसंन्यास केल्यावरच ज्ञानयोगाची साधना शक्य आहे. ह्या ठिकाणी ज्ञान म्हणजे क्रियेसंबंधाचे ज्ञान असाच घ्यावा लागेल. अशाच ज्ञानाने कर्माचे अनुष्ठान शक्य आहे. *'विद्यां चाविद्यां च'* इत्यादि श्रुतींत (ईशावास्योपनिषत् ११) विद्येने अमृतत्वाची प्राप्ती प्रतिपादलेली आहे. हे अमृतत्व सापेक्ष आहे. जिथे मृत्यू नाही अशा देवत्वाला (*अमृतं देवात्मभावम्* - भ.पू.पा. शंकराचार्य) अमृतत्व म्हटले आहे. मोक्ष अद्वितीय आत्मज्ञानानेच होतो. राजा गोकर्णाला जाऊन मुक्त झाला म्हणजे दोषमुक्त झाला आणि

ज्ञानाचा अधिकारी झाला असा अर्थ आहे.५२. असे हे गोकर्ण परमपवित्र क्षेत्र साधुसंतांना आश्रयभूत आहे. म्हणून संतांचा प्राणच असे श्रीपाद तिथेच राहिले.५३. सज्जनांना जन्ममरणरूपी संसारापासून सोडवीत तिथे (गोकर्ण क्षेत्री) राहून ते श्रीपाद कृष्णाकांठी कुरुगड्डी येथे जाऊन अदृश्य झाले.५४.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सहावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# । अथ सप्तमोऽध्यायः।

॥ नामधारक उवाच ॥

**साधूनुद्धर्तुकामोऽथ कुतो लीलाविहार्यभूत् । अदृश्यो भगवांस्तत्तु श्रोतुमिच्छामि सादरम् ॥१॥**

॥ सिद्ध उवाच ॥

**अतीन्द्रियोऽपि दृश्योऽत्र भूत्वा लीलात्मना पुनः । अवतारप्रसङ्गेन जातोऽदृश्य इदं शृणु ॥२॥**

**तत्राभूच्छान्दसः कश्चिदम्बिका नाम तद्वधूः । कुपुत्रं सुषुवे दैवात्स्तब्धं हीनमतिं जडम् ॥३॥**

अथ साधून् उद्धर्तुकामः लीलाविहारी भगवान तु कुतो अदृश्यो अभूत्? तत् सादरं श्रोतुं इच्छामि।१। अतीन्द्रियः अपि लीलात्मना दृश्यः भूत्वा पुनः अवतारप्रसंगेन अदृश्यः जातः। इदं शृणु।२। तत्र कश्चित् छांदसः अभूत्। तत्+वधूः अम्बिका नाम दैवात् स्तब्धं, हीनमतिं, जडं कुपत्रं सुषुवे।३।

श्रीगणेशाय नमः। मागच्या अध्यायांत 'श्रीगुरू साधूंना जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवतात' असे सांगितले; ते कोणत्या साधनाने?, हा प्रश्न अपेक्षून, विशेषतः मंद अधिकाऱ्यांसाठी, 'ज्ञानयोगांतच अंतर्भूत असलेल्या भक्तियोगाने', असे उत्तर ह्या अध्यायात दर्शविले आहे. **सातव्या अध्यायी ब्राह्मणीचे दुःख परिहरले। चोरांस मारून मृत द्विजास उठवीले।।** नामधारक विचारतात, साधूंचा उद्धार करूं इच्छिणारा लीलादेहाने विचरणारा भगवंत कां अदृश्य झाले हे मी आदरपूर्वक ऐकूं इच्छितो.१. सिद्धमुनी सांगतात, मन, बुद्धी, इंद्रियांना अगोचर असलेले श्रीदत्तप्रभू लीलादेहाने प्रकट झाले. पुढे पुन्हां दुसरा अवतार घ्यायचा असल्याने ते अंतर्धान पावले; ती गोष्ट सांगतो, ऐक.२. तिथे कुरुपुरांत एक वैदिक ब्राह्मण आपली पत्नी अंबिकेसह राहत होता. दैवयोगाने तिने एका मठ्ठ, मंदमती, वेडसर मुलाला जन्म दिला.३.

**वर्णधर्मोपनीतं तं सावित्र्युच्चारणाक्षमम् । ताडयन्तं निवार्याह स्वपतिं वैदिकं वधूः ।।४।।**
**भो जडोऽर्भोऽश्मवद्योनेरेवालं खेदहेतुना । ताडनेन त्यजाम्यस्मिंस्ताडितेऽसून्सुधीरिति ।।५।।**
**सोऽप्यजाकण्ठकुचवत्तं मत्वाश्रुत्य तद्वचः । तूष्णीं तस्थौ ततो विप्रः कालेनाल्पीयसा मृतः ।।६।।**
**तत्र पुत्रान्विता माता जीवनं याच्ञयाऽकरोत् । काले याते कियत्येवं निन्दां चक्रुर्द्विजोत्तमाः ।।७।।**

वर्णधर्म+उपनीतं (अपि) सावित्री+उच्चारण+अक्षमं तं ताडयन्तं वैदिकं स्वपतिं निवार्य वधू आह।४। भो योनेः+एव अर्भः अश्मवत् जडः (अस्ति)। खेदहेतुना (तस्य) ताडनं अलम्। सुधीः, अस्मिन् ताडिते असून् त्यजामि।५। सः अपि तत्+वचः श्रुत्वा, तं अजा+कंठ+कुच+वत् मत्वा तूष्णीं तस्थौ। ततो अल्पीयसा कालेन विप्रः मृतः।६। पुत्र+अन्विता माता तत्र याच्ञया जीवनं अकरोत्। एवं कियति काले याते द्विज+उत्तमाः निन्दां चक्रुः।७।

आठव्या वर्षी ब्राह्मणाची मुंज करावी ह्या धर्माज्ञेप्रमाणे त्याच्या पित्याने त्याची मुंज लावून दिली तरी त्याला गायत्रीमंत्राचा साधा उच्चारही करतां येईना. त्यामुळे त्याच्यावर रागावून तो वैदिक ब्राह्मण त्या मुलाला मारूं लागला. ते न पाहवून त्याची पत्नी त्याला अडवून म्हणाली.४. 'अहो नाथ! जन्मतःच हा बाळ दगडासारखा बुद्धिहीन आहे. त्याच्यावर रागावून काय उपयोग आहे? आपण वैफल्याने त्याला असे ऊठसूट मारूं नका. आपण सूज्ञ आहांत. याउप्पर त्याला असे बडवाल तर मीच जीव देईन!'५. त्या ब्राह्मणानेही तिचे ते बोलणे ऐकले आणि 'हा शेळीच्या गळ्याला लोंबणाऱ्या स्तनाप्रमाणे निरुपयोगी आहे' असा विचार करून गप्प राहिला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी तो ब्राह्मण मरण पावला.६. मग ती माता आपल्या पुत्राबरोबर त्या कुरुपुरांत भिक्षा मागून चरितार्थ चालवूं लागली. असा कांही काळ गेल्यावर त्या गांवातले श्रेष्ठ ब्राह्मण त्याची निंदा करूं लागले.७.

**सूर्यर्च्यजैषा वृत्तिस्ते गर्ह्याऽस्माकं न रोचते । इतो व्रज त्यजासून्वा तैरित्युक्तो नदीं ययौ ।।८।।**
**कृष्णाविष्टं समं मात्रा मर्तुकामं विलोक्य तौ । निषिध्योचेऽनुकम्पार्द्रः श्रीपादस्तीरवास्यसौ ।।९।।**
**साहसं मा कुरु ब्रह्मन्नात्महत्या हि दुर्वहा । भवे भवेऽप्यतोऽत्रैव सम्प्राप्तसहनं वरम् ।।१०।।**

हे सूरि+अर्च्यज! ते एषा गर्ह्या वृत्तिः अस्माकं न रोचते। इतो व्रज वा असून त्यज।८। तैः इति उक्तः (पुत्रः) मात्रा समं मर्तु+कामं नदीं ययौ। कृष्णाविष्टं तौ विलोक्य असौ तीरवासी श्रीपादः अनुकम्पा+आर्द्रः उचे।९। हे ब्रह्मन्! साहसं मा कुरु। आत्महत्या हि दुर्वहा। अतो भवे भवे अत्र एव संप्राप्त+सहनं वरम्।१०।

'विद्वानांत पूज्य असलेल्या पित्याच्या पोटी जन्म घेऊन तू ही जी आईच्या भिकेवर पोट भरण्याची निंद्य वृत्ती अवलंबिली आहेस ती आम्हांला रुचत नाही. तूं इथून निघून जा किंवा कुठे तरी जाऊन जीव दे!' त्यांच्या ह्या वक्तव्याने व्यथित होऊन तो मुलगा आपल्या मातेसह जीव देण्यासाठी नदीवर गेला.८. जीव देण्यासाठी कृष्णेत प्रवेश करणाऱ्या त्या मायलेकरांना पाहून तीरावर असलेल्या ह्या श्रीपादप्रभूंना दया आली आणि ते म्हणाले.९. 'अरे ब्राह्मणा! असा अविचार करूं नकोस. जाणीवपूर्वक ब्राह्मणाने आत्महत्या केली तर आत्महत्येच्या पापाबरोबरच ब्रह्महत्येचेही पाप लागते. ईशावास्य उपनिषदात(३) सांगितल्याप्रमाणे आत्महत्या करणारे लोक मृत्यूनंतर सूर्यरहित गाढ अंधाराच्या लोकांत जातात. म्हणून जन्मोजन्मी आपल्या प्रारब्धाने जे जे कष्ट प्रप्त होतील ते ते भोगणेच बरे आहे.'१०.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**प्राज्ञोद्भूतकुपुत्रत्व-हेतुनैवाखिला हि माम् । धिक्कुर्वन्त्यपि नेक्षन्ति तत्किं कार्यमतःपरम् ॥११॥**

॥ श्रीपाद उवाच ॥

**हत्यया लिप्स्यसेऽग्रेऽतो दुःखं निस्तीर्य दैविकम् । शिवतोषात्सुपुत्रस्ते भविष्यति भवान्तरे ॥१२॥**

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**त्वयोक्तं साध्वहं कुर्यां तथैव तु कथं भवेत् । शिवतोषः पुरा केन कृतः श्रावय विस्तरात् ॥१३॥**

ब्राह्मणी उवाच। प्राज्ञ+उद्भूत+कुपुत्र+हेतुना एव अखिला (जना) मां धिक् कुर्वति हि। न ईक्षन्ति अपि। तत् अतः परम् किं कार्यम्?।११। श्रीपाद उवाच। हत्यया लिप्स्यसे। अतो दैविकं दुःखं निस्तीर्य अग्रे शिव+तोषात् भव+अंतरे ते सुपुत्रः भविष्यति।१२। ब्राह्मणी उवाच। त्वया साधु उक्तम्। अहं तु तथा एव कुर्याम्। शिवतोषः कथं भवेत्, पुरा केन कृतः (तत्) विस्तरात् श्रावय।१३।

मुलगा कांहीच बोलला नाही. आईनेच सांगितले. विद्वानाच्या पोटी हा नतद्रष्ट जन्माला आला. ह्याच गोष्टीवरून सर्वजण माझा धिक्कार करतात. आम्हांला डोळ्यांसमोरही येऊं देत नाहीत. अशा परिस्थितीत आम्ही (जीव देण्यावांचून दुसरे) काय करणार?११. श्रीपाद म्हणाले, '(तसे करशील तर) (आत्म)हत्येचा दोष लागेल. यासाठी कर्माने प्राप्त झालेले दुःख भोगून टाक. पुढे जर शंकराला (उपासनेने) प्रसन्न करशील तर जन्मांतरी तुला चांगला मुलगा होईल.'१२. ब्राह्मणी म्हणाली, 'आपण उत्तम सांगितले. मी अवश्य त्याचप्रमाणे करीन. भगवान शिव कसे प्रसन्न होतील? पूर्वी कुणी त्यांना अशा रीतीने प्रसन्न केले? हे मला आपण विस्ताराने सांगाल तर माझीही श्रद्धा आणि भक्ती दृढ होऊन मी तसे करीन.'१३. श्रीपाद सांगूं लागले, 'पूर्वीं उज्जैन नगरीत चंद्रसेन नांवाचा राजा होता. त्याचा मणिभद्र नांवाचा मित्र शंकराचा भक्त होता. त्याला भगवान शंकरांनी प्रसन्न होऊन इच्छिलेली वस्तू देणारा चिंतामणी दिला.१४.

**।। श्रीपाद उवाच ।।**

**उज्जयिन्यां पुरा चन्द्र-सेनराजसखोऽलभत् । मणिभद्रः शिवाच्छैवश्चिन्तामणिमभीष्टदम् ।।१४।।**
**तं ज्ञात्वार्घादिनाऽलभ्यं युद्धायाभ्यागतान्नृपान् । श्रुत्वाऽप्येकाग्रचित्तोऽसौ प्रदोषेऽपूजयच्छिवम् ।।१५।।**
**मन्दानङ्गप्रदोषे तं मणिं भूपं तथाविधम् । दृष्ट्वा गोपसुतास्तद्वत्स्वाङ्गणे चक्रुरर्चनम् ।।१६।।**
**गोप्यो निवार्य पत्राद्यैर्लिङ्गकल्पनयोपलम् । भजतो निन्युरत्तुं तांस्तस्थौ तत्रैकबालकः ।।१७।।**
**प्रसह्याप्युद्धृतोऽर्चां स मात्रोद्वास्यापतद्भुवि । शम्भुपूजाभङ्गभिया निर्विण्णो मर्तुमुद्यतः ।।१८।।**

श्रीपाद उवाच। पुरा उज्जयिन्यां चंद्रसेन+राज+सखः मणिभद्रः शिवात् अभीष्टदं चिंतामणिं अलभत्।१४। तं अर्घ+आदिना अलभ्यं ज्ञात्वा नृपान् युद्धाय अभ्यागतान् श्रुत्वा अपि असौ एकाग्रचित्तः प्रदोषे शिवं अपूजयत्।१५। तं मणिं, भूपं (च) मंदानंग+प्रदोषे तथाविधं दृष्ट्वा गोपसुताः स्वाङ्गणे तद्वत् अर्चनं चक्रुः।१६। लिंग+कल्पनया उपलं भजतः तां गोप्यो निवार्य अत्तुं निन्युः। तत्र एक बालकः तस्थौ।१७। मात्रा अर्चां उद्वास्य प्रसह्य उद्धृतः अपि सः शम्भु+पूजा+भंग+भिया निर्विण्णो मर्तुम् उद्यतः भुवि अपतत्।१८।

तो चिंतामणी धनादिकांच्या मोबदल्यांत मागूनही तो राजाने न दिल्यामुळे परकीय राजे सर्व बाजूंनी युद्धासाठी चालून आल्याचे समजूनही राजा आणि मणिभद्र प्रदोषकाळी एकाग्रचित्ताने शंकरांचे पूजन करीत होते.१५. त्या राजाला आणि मणिभद्राला शनिप्रदोषाच्या पर्वांत तशी पूजा करतांना पाहून कांही गवळ्याच्या मुलांनी आपल्या आंगणांत तशीच पूजा आरंभिली.१६. लिंगाच्या आकाराचा दगड ठेवून पानाफुलांनी त्यांची पूजा करणाऱ्या त्या मुलांना, त्यांच्या माता ज्या गोपी, त्यांनी जेवणासाठी ओढून नेले. सगळी मुले याप्रमाणे निघून गेली; पण एक बालक मात्र पूर्वजन्मींच्या भक्तीच्या संस्कारांमुळे पूजा टाकून न जातां तिथे तसाच बसून राहिला.१७. आईने पूजा विस्कटून त्याला जबरदस्तीने ओढूनही तो गोपीकुमार शिवपूजेचा भंग होईल या भीतीने अत्यंत खिन्न होऊन प्राण त्यागण्याच्या इच्छेने जमिनीवर पडला.१८.

**तद्भावं विश्वसाक्षीशो ज्ञात्वाऽविष्कृत्य शोभनम् । स्वं रूपं बालमाश्वास्य वरं वृण्विति तं जगौ ।।१९।।**
**बालोऽपि दिव्यरूपं तं नत्वोचे भुवनेश्वर । मात्रोत्सृष्टाऽत्र ते पूजा तन्मन्तुं क्षन्तुमर्हसि ।।२०।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्या सायुज्यभाङ्मेऽसि कृतं मात्रा त्वबोधतः । नायं मन्तुः सापि भूयाद्विष्णुमाताऽर्चनेक्षणात् ।।२१।।**
**इत्युक्त्वान्तर्दधे सोऽभूद्भास्वल्लिंगं य आगताः । त ऊचुः पुण्यश्लोकार्थं दोषाऽप्यर्कोऽत्र तिष्ठति ।।२२।।**
**धन्येन सह योद्धव्यं नास्माभिरिति ते नृपाः । निश्चित्य स्निग्धभावेन तौ द्रष्टुं सर्व आययुः ।।२३।।**

विश्वसाक्षी ईशः तत्+भावं ज्ञात्वा स्वं शोभनं रूपं आविष्कृत्य, बालं आश्वास्य वरं वृणु इति तं जगौ।१९। बालः अपि तं दिव्यरूपं नत्वा ऊचे, (हे) भुवनेश्वर! मात्रा ते पूजा उत्सृष्टा, तं मन्तुं क्षन्तुं अर्हसि।२०। शिव उवाच। त्वं भक्त्या मे सायुज्यभाक् असि। मात्रा कृतं तु अबोधतः। न अयं मन्तुः। सा अपि अर्चन+ईक्षणात् विष्णुमाता भूयात्।२१। इति उक्त्वा सः अन्तर्दधे। लिङ्गं भास्वत् अभूत्। ये आगताः (राजानः) ते ऊचुः अत्र पुण्यश्लोक+अर्थं दोषा अपि अर्कः तिष्ठति।२२। अस्माभिः धन्येन सह न योद्धव्यम्। इति निश्चित्य ते सर्वे नृपाः स्निग्ध+भावेन तौ द्रष्टुं आययौ।२३।

जगताचा द्रष्टा जो भगवान शंकर त्याने त्या बालकाचा भक्तिभाव जाणला आणि आपले मनोहर रूप त्याच्यापुढे प्रकट केले. त्या बाळाची समजूत घालून ते त्याला वर माग असे म्हणाले.१९. त्या गोपाळाने त्या दिव्य रूपाला नमस्कार केला आणि म्हणला, माझ्या आईने आपली पूजा मोडून टाकली त्या अपराधाची आपण क्षमा करावी.२०. भगवान शंकर उत्तरले, तुझ्या भक्तीपोटी तुला माझे सायुज्य दिले! तुझ्या आईने अजाणतां केल्याने हा अपराधच होत नाही. उलट माझी पूजा तिने पाहिली ह्या पुण्याईने ती जन्मांतरी विष्णूची आई होईल.२१.असे बोलून शिवभगवान अंतर्धान पावले. गोपबालकाने पूजिलेले ते दगडाचे लिंग एकदम सूर्यासारखे प्रकाशले. त्याचा प्रकाश नगरभर पसरलेला पाहून युद्धासाठी आलेले राजे लोक म्हणू् लागले, हा राजा केवढा पुण्यश्लोक आहे! त्याच्या नगरांत रात्रीही सूर्य थांबलेला दिसतो!२२.

**पूजां कृत्वापि राट् द्योत-हेतुं निश्चित्य तैः सह । नृपैर्गोपाङ्गणं गत्वा प्राप लिङ्गेक्षणान्मुदम् ।।२४।।**
**श्रुत्वा गोपमुखात्सर्वं तुष्टास्तस्मै नृपाः श्रियम् । दत्वा गोपाधिपत्यं च स्वं स्वं स्थानं ययुर्मुदा ।।२५।।**
**सा तु प्रेत्य यशोदाख्या गोपी भूत्वा हरिं सुतम् । प्रापेशतोषात्तस्मात्ते तथा भूयाच्छिवार्चनात् ।।२६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**कष्टाद्दैवाच्छिवे तुष्टे फलं भाव्यधुनामुना । कष्टेनायुः कथं लङ्घ्यं मातृत्वेनाव मामतः ।।२७।।**

राट् अपि पूजां कृत्वा तैः नृपैः सह द्योत+हेतुं निश्चित्य गोप+अङ्गणं गत्वा लिङ्ग+ईक्षणात् मुदं प्राप।२४। गोप+मुखात् सर्वं श्रुत्वा तुष्टाः नृपाः तस्मै श्रियं गोप+अधिपत्यं च दत्वा मुदा स्वं स्वं स्थानं ययुः।२५।

हा राजा धन्य आहे! अशाबरोबर आपण युद्ध करणे योग्य नाही, असा निश्चय करून ते सगळे राजे स्नेहभावाने त्या राजाच्या आणि मणिभद्राच्या दर्शनासाठी आले.२३. राजानेही पूजा विधिवत् संपन्न केली आणि त्या राजांसह प्रकाशाचे मूळ शोधत गवळीवाड्यात आले.२४. तिथे त्या लिंगाचे दर्शन घेऊन ते सर्व आनंदित झाले. त्या गोपाळाच्या तोंडून सर्व ऐकून सर्वही राजांना हर्ष झाला. त्यांनी त्या गोपाळाला विपुल धन देऊन गौळी समाजाचा प्रमुख केले आणि आनंदाने आपापल्या ठिकाणी निघून गेले.२५. ती गोपी मृत्यूनंतर यशोदा नांवाची गोपी म्हणून जन्मली आणि भगवान शंकरांच्या कृपेने साक्षात् विष्णूचा अवतार जो गोपाळकृष्ण, त्याची आई झाली. त्याचप्रमाणे तू शंकरांची पूजा केलीस तर तुलाही विष्णूसारखा मुलगा होईल.२६. ब्राह्मणी म्हणाली, 'प्रयासाने आणि दैवयोगाने शंकर प्रसन्न झालेच तर पुढच्या जन्मी हे फळ मिळेल. आतां ह्या मंदमती मुलासह हे कष्टमय आयुष्य कसे घालवावे? आपणच मला आई समजून माझे रक्षण करावे.'२७.

**इत्यशाठ्यं सकारुण्यं श्रुत्वा प्रीतो दयार्द्रधीः । ओमित्युक्त्वा दधौ पाणिं दुष्प्रापं मूर्खमूर्धनि ।।२८।।**
**सहसा गीष्पतिसमो बभूव श्रुतिशास्त्रवित् । मातृभक्तौ विनीतं तं नियुज्याहाम्ब मे शृणु ।।२९।।**
**विस्मृत्याऽकमनेनेश-पूजयायुःक्षयं कुरु । पुत्रो भाविभवे मादृक्ते भविष्यति वा इति ।।३०।।**
**साऽप्यत्यर्थं प्रहृष्टा तदाज्ञया सहसूनुना । ग्रामं गत्वेशमानर्च विद्वन्मान्य सुतान्विता ।।३१।।**
**मादृङ्नान्यो भवेयं चेन्नास्याः पुत्रो मृषा वचः । अतोऽवतीर्य तत्कुर्यामित्यमंस्ताज ईश्वरः ।।३२।।**

सा तु प्रेत्य यशोदा+आख्या गोपी भूत्वा ईश+तोषात् हरिं सुतं प्राप। तस्मात् ते शिव+अर्चनात् तथा भूयात्।२६। ब्राह्मणी उवाच। कष्टात् दैवयोगात् (च) शिवे तुष्टे भावि फलम्। अधुना अमुना कष्टेन आयुः कथं लङ्घ्यम्? अतः मां मातृत्वेन अव।२७। इति अशाठ्यं सकारुण्यं (वचं) श्रुत्वा दया+आर्द्र+धीः प्रीतः 'ॐ' इति उक्त्वा मूर्ख+मूर्धनि दुष्प्रापं पाणिं दधौ।२८। सः सहसा गीष्पति+समः श्रुति+शास्त्र+वित् बभूव। विनीतं तं मातृ+भक्तौ नियुज्य आह, '(हे)अम्ब! मे श्रुणु'।२९। अनेन अकं विस्मृत्य ईश+पूजया आयु+क्षयं कुरु। भावि+भवे ते मादृक् पुत्रो भविष्यति वा।३०। सा अपि अत्यर्थं प्रहृष्टा। तत् आज्ञया सूनुना सह ग्रामं गत्वा विद्वत्+मान्य सुत+अन्विता ईशं आनर्च।३१। मादृक् अन्यः न। अस्याः पुत्रः न भवेयं चेत् (मम) वचः मृषा (स्यात्)। अतः अवतीर्य तत् कुर्यां इति अजः ईश्वरः अमंस्त।३२।

हे तिचे निर्व्याज आणि काकुळतीचे बोलणे ऐकून दयाक्लिन्न अंतःकरणाचे श्रीपाद प्रसन्न झाले आणि त्यांनी 'ॐ' असे म्हणून आपला देवदुर्लभ हात त्या मठ्ठ मुलाच्या मस्तकावर ठेवला.२८. तो मंदमती मुलगा तेव्हां तत्काळ बृहस्पतीसारखा वेदशास्त्रसंपन्न झाला आणि त्याने श्रीपादप्रभूंना नमस्कार केला. त्याला आईची भक्ती करण्याचा आदेश देऊन श्रीपाद त्या ब्राह्मणीला म्हणाले, 'माते, माझे ऐक!'२९. 'ह्या तुझ्या विद्वान् पुत्रासह तूं तुझे पूर्वीचे सर्व दुःख विसरून जा आणि उरलेले जीवन शंकरांच्या पूजेत व्यतीत कर. येणाऱ्या जन्मात तुला अवश्य माझ्यासारखा पूज्य मुलगा होईल.'३०. ती ब्राह्मणीही अत्यंत आनंदित होऊन श्रीपादांची आज्ञा घेऊन आपल्या मुलासह गांवांत गेली. तिथे सर्व विद्वानांतही सन्मानित झालेल्या त्या मुलासह तिने आयुष्यभर शंकरांचे आराधन केले.३१.

**कृतावतारसङ्कल्पः कार्यानन्त्यान्न सोऽत्यजत् । लीलाङ्गं तत्र भजतामदृश्योऽप्यस्ति कामदः ।।३३।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सङ्कल्पवान्कथं कार्येऽपूर्णेऽप्यन्योऽभवत्कथम् । स्थित्वाद्यधाम्नाऽदृश्योऽपि भजतां कामदः कथम् ।।३४।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**कार्यानन्त्याद्विश्वबीजे सङ्कल्पानन्त्यमव्यये । नृणां कलिमलान्धानां स प्रत्यक्षोऽप्यदृश्यवत् ।।३५।।**

कृत+अवतार+संकल्पः सः कार्य+आनंत्यात् लीलाङ्गं न अत्यजत्। तत्र भजतां अदृश्यः अपि कामदः अस्ति।३३। नामधारक उवाच। कार्ये अपूर्णे अपि संकल्पवान् कथम्? आद्य+धाम्ना स्थित्वा अपि अन्यः कथं अभवत्? (तत्र) अदृश्यः अपि भजतां कामदः कथम्?३४। सिद्ध उवाच। विश्व+बीजे अव्यये कार्य+आनंत्यात् संकल्प+आनंत्यम्। कलि+मल+अंधानां नृणां सः प्रत्यक्षः अपि अदृश्यवत् (अस्ति)।३५।

'माझ्यासारखा त्रिभुवनांत कुणीच नाही कारण मी एकमेवाद्वितीय आहे. म्हणजे मलाच तिच्या पोटी विशुद्ध सत्त्वात्मक स्वेच्छामय रूपाने अवतार घेतला पाहिजे. तरच माझे वचन सत्य होईल' असा त्या निर्विकार परमेश्वराने विचार केला.३२. अशा रीतीने पुढच्या अवताराचा संकल्प करूनही त्या दत्तप्रभूंनी आपले भक्तरक्षणादि कार्य कधीही न संपणारे असल्याने तो लीलादेह टाकला नाही. तिथे श्रीपादवल्लभ अशुद्ध चित्ताच्या लोकांना अदृश्य असले तरी आपल्या भक्तांच्या कामना पूर्ण करीत आजही विद्यमान आहेत. मुंडकोपनिषदांत (२:१:२) ब्रह्माचे वर्णन शुद्ध आणि मन-प्राणानी रहित असे केले आहे. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:३) काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधीरता, लज्जा, भीती, बुद्धी ही सर्व मनाचीच रूपे सांगितली आहेत. तर मग अमनस्क परमेश्वराचा संकल्प कसा होऊं शकतो? तर परब्रह्माच्या ईक्षणासारखाच संकल्पाचाही प्रयोग निर्दोष आहे. माया त्याच्या आधीन असल्याने तो स्वतंत्रच आहे असा भाव आहे.३३.

**प्राग्वृत्तं शृण्वदृष्टेऽस्मिन्द्विजः कश्चित्कुटुम्ब्यभूत । धीमान्द्यात्स वणिग्वृत्तिः श्रीपादाङ्घ्र्यर्पितान्तरः ।।३६।।**
**व्यापारे मेऽधिलाभश्चेद्भूयात्तदनुसारतः । कुर्यां कुरुपुरे विप्र-भोजनं श्रीशतुष्टये ।।३७।।**
**इत्युक्त्वाऽगात्स्मरञ्छ्रीशं व्यापारार्थं ततो धनम् । लेभे भूरि तदादाय ययौ संकल्पसिद्धये ।।३८।।**
**मार्ग एकाकिनं यान्तं तं सार्थं प्रेक्ष्य तस्कराः । सुहृत्तया तदनुगा भूत्वा तं विजनेऽहनन् ।।३९।।**

अस्मिन् अदृष्टे (सति)प्राक् वृत्तं शृणु। कश्चित् कुटुंबी द्विजः अभूत्। धी+मांद्यात् सः वणिक्+वृत्तिः श्रीपाद+अङ्घ्रि+अर्पित+अंतरः (स्यात्)।३६। मे व्यापारे अधिलाभः भूयात् चेत् तत्+अनुसारतः कुरुपुरे श्री+ईश+तुष्टये विप्र+भोजनं कुर्याम्।३७। इति उक्त्वा श्रीशं स्मरन् व्यापारार्थं अगात्। ततो भूरि धनं लेभे। तत् आदाय संकल्प+सिद्धये ययौ।३८। मार्गे एकाकिनं स+अर्थं यान्तं तं प्रेक्ष्य तस्कराः सुहृत्तया तत्+अनुगा भूत्वा तं विजने अहनन्।३९।

नामधारकास पडलेले तीन प्रश्न तो विचारीत आहे. कुरवपूरचे कार्य पूर्ण झालें नसतांना दुसऱ्या अवताराचा संकल्प कसा केला? पूर्वरूपाने राहूनही वेगळे रूप कसे धारण केले? श्रीपाद अदृश्य असूनही त्या कुरवपुरांत भक्ताच्या कामना कसे पूर्ण करतात? पुढील श्लोकापासून सिद्धमुनी याच तीन प्रश्नांची उत्तरे सांगत आहेत.३४. जगताचे मूळ असणाऱ्या परमात्म्याची कार्ये अनंत आहेत; त्यानुसार संकल्पही अनंतच होतात. श्रीपादांचे जरी कुरवपुरांत प्रत्यक्षच वास्तव्य असले तरी कलिकाळाच्या दोषाने आंधळ्या झालेल्या लोकांना ते अदृश्यासारखेच आहेत.३५. हे श्रीपादमुनी अदृश्य झाल्यानंतर एक जुनी घडलेली गोष्ट ऐक. कोणी एक ब्राह्मण गृहस्थ होता. बुद्धीच्या मंदतेमुळे तो ब्रह्मकर्म न करतां व्यापाराने चरितार्थ करीत असे. त्याच्या मनांत श्रीपादश्रीवल्लभांच्या ठायीं निस्सीम भक्ती होती.३६. मला व्यापारांत भरपूर नफा झाल्यास त्या प्रमाणांत श्रीपादवल्लभांना कुरुगड्डीत ब्राह्मणभोजनाने संतुष्ट करीन.३७. असा मनोमन नवस बोलून श्रीपादांचे स्मरण करीत तो परगांवी व्यापाराला निघाला. तेव्हां त्याला भरपूर पैसा मिळाला. तो पैसा घेऊन आपला बोललेला संकल्प पूर्ण करण्यासाठी तो कुरुगड्डीला निघाला.३८.

**तदैव सहसा तत्र श्रीपादः शूलपात्रधृक् । प्राप्य ताञ्छितधारेण त्रिशूलेन जघान सः ।।४०।।**
**एकस्तमेत्य शरणं प्रोचे चोरधिया तु नो । सङ्गीभूतोऽस्मि मां ज्ञात्वा यथेष्टं कुरु भो प्रभो ।।४१।।**
**श्रीपादोऽपि सकारुण्यां श्रुत्वोक्तिं विमलान्तरम् । ज्ञात्वा तं योजयामास तद्रक्षायै कृपार्द्रधीः ।।४२।।**
**कबन्धे तच्छिरः कृत्वा भस्माक्तं जलमन्त्रितम् । सजीवं तं द्विजं कृत्वा क्षणादन्तर्दधे स तु ।।४३।।**
**स सुप्तोत्थितवद्बुध्वा दृष्ट्वा चोरान्मृतान् द्विजः । हतशेषमुखात्सर्वं श्रुत्वा खिन्नान्तरोऽभवत् ।।४४।।**

तदा एव शूल+पात्र+धृक् श्रीपादः सहसा तत्र प्राप्य सः तान् शित+धारेण त्रिशूलेन जघान।४०। एकः तं शरणं एत्य प्रोचे। 'भो प्रभो, (अहं) तु चोर+धिया नो संगीभूतः अस्मि। मां ज्ञात्वा यथा+इष्टं कुरु'।४१। कृपा+आर्द्र+धीः श्रीपादः अपि सकारुण्यां उक्तिं श्रुत्वा तं विमल+अंतरं ज्ञात्वा तं तत्+रक्षायै योजयामास।४२। तत् शिरः कबंधे भस्म+आक्तं जल+मंत्रितम् कृत्वा तं द्विजं सजीवं कृत्वा स तु क्षणात् अन्तर्दधे।४३। स द्विजः सुप्त+उत्थितवत् बुद्ध्वा मृतान् चोरान् दृष्ट्वा हत+शेष+मुखात् सर्वं श्रुत्वा खिन्न+अंतरः अभूत्।४४।

त्या वाटेने त्याला पैसे घेऊन एकट्यानेच जातांना चोरांनी पाहिले आणि त्याच्याशी मित्रत्वाचे नाटक करून त्याला जंगलांत निर्जन ठिकाणी मारून टाकले.३९. त्याच वेळी शूल आणि कमंडलु धारण केलेले श्रीपाद एकाएकी तिथे आले आणि त्या चोरांना त्यांनी आपल्या तीक्ष्ण त्रिशूलाने ठार मारले.४०. त्यांच्यापैकीं एकजण श्रीपादांना शरण येऊन म्हणाला, 'महाराज! मी हे चोर असल्याचे न जाणतां यांच्याबरोबर आलो. आपण (हे) ओळखून आपल्याला वाटेल त्याप्रमाणे करा.'४१. दयेने ओथंबलेल्या अंतःकरणाच्या श्रीपादांनी ही काकुळतीची विनवणी ऐकून आणि त्याचे मन निष्कपट असल्याचे जाणून त्या ब्राह्मणाच्या रक्षणासाठी त्याची योजना केली.४२. त्या ब्राह्मणाचे डोके धडाला जोडून भस्मयुक्त मंतरलेल्या पाण्याने त्याला जिवंत केले आणि ते श्रीपाद क्षणार्धांत गुप्त झाले.४३. तो ब्राह्मण झोंपेतून जागावे तसा उठला. तेव्हां मरून पडलेले चोर त्याला दिसले. त्यांच्यापैकी उरलेल्याच्या तोंडून त्याने सर्व हकीकत ऐकली आणि तो खिन्नचित्त झाला.४४.

**कृत्वा तु मत्कृते कृच्छ्रं जातोऽयं चोरगोचरः । सर्वदाऽऽराधितो दैवान्नायं मे दृष्टिगोचरः ।।४५।।**
**इत्युक्त्वा धनमादाय गत्वा कुरुपुरं द्विजः । चतुःसहस्रसद्विप्र-भोजनं श्रद्धया व्यधात् ।।४६।।**
**ततः श्रीशप्रसादात्स सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । इत्याद्या भूरिशो वृत्ताः सत्यदृश्येऽपि तत्कथाः ।।४७।।**
**प्रत्यक्षस्तु सतां तत्र कच्चराणां त्वगोचरः । सोऽप्यन्यत्रावतीर्यात्र स्वरूपेणेष्टकामदः ।।४८।।**

'मत्कृते कृच्छ्रं कृत्वा तु अयं चोर+गोचरः जातः। सर्वदा आराधितः अयं दैवात् मे दृष्टि+गोचरः न'।४५। इति उक्त्वा द्विजः धनं आदाय कुरुपुरं गत्वा श्रद्धया चतुः+सहस्र+सत्+विप्र+भोजनं व्यधात्।४६। ततः सः द्विजः श्रीश+प्रसादात् उभयीं सिद्धिं प्राप। अदृश्ये सति अपि इत्याद्या तत्+कथाः भूरिशः वृत्ताः।४७। सः सतां तत्र प्रत्यक्षः, कच्चराणां तु अगोचरः (सन्) अन्यत्र अवतीर्य अपि अत्र स्वरूपेण इष्ट+कामदः।४८।

तो म्हणाला, 'ह्या श्रीपादांनी माझ्यासाठी एवढे कष्ट केले. पण चोरांना दर्शन देऊनही, सर्वदा त्यांची आराधना करणाऱ्या मला मात्र त्यानी दर्शन दिले नाही!'४५. असा खेद व्यक्त करून तो आपले धन घेऊन कुरुगड्डीला गेला. तिथे त्याने भक्तिभावाने चार हजार उत्तम ब्राह्मणांना भोजन घातले.४६. नंतर त्या ब्राह्मणाचे श्रीपादवल्लभांच्या प्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक कल्याण झाले. श्रीपादगुरू अदृश्य झाल्यानंतरही अशा कित्येक घटना घडल्या आहेत.४७. त्या श्रीगुरूंचा पापी लोकांना अनुभव येत नसला तरी साधूंना मात्र ते प्रत्यक्षच आहेत. दुसऱ्या ठिकाणी अवतरूनही इथे आपल्या पूर्वरूपाने ते भक्तांच्या कामना पुरवीत असतात.४८.

**वेदयज्ञतपोदान-प्रदिष्टफलतोऽधिकम् । श्रीपादाधिष्ठितस्थान-वासिनां द्राक्फलं लभेत् ।।४९।।**
**यत्र कुत्रापि ये केचिच्छ्रीपादाङ्घ्रिसरोरुहे । संस्मरन्त्यपि तेभ्यः स कामानिष्टान्ददात्यलम् ।।५०।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीपादमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः।।७।।**

वेद+यज्ञ+तपः+दान+प्रदिष्ट+फलतो श्रीपाद+अधिष्ठित+स्थान+वासिनां अधिकं फलं लभेत्।४९। यत्र कुत्र अपि ये केचित् श्रीपाद+अंघ्रि+सरोरुहे संस्मरन्ति अपि तेभ्यः सः इष्टान् कामान् अलं ददाति।५०।

वेदांच्या अध्ययनादिकांनी, यज्ञादींच्या अनुष्ठानाने, शरीरशोषणादि तपांनी, सत्पात्री केलेल्या दानाने मिळणाऱ्या फळापेक्षांही अधिक - म्हणजे मोक्षरूपी फळ, श्रीपादगुरूंनी पावन केलेल्या त्या कृष्णतीरींच्या स्थानांत राहणाऱ्यांना शीघ्र मिळते. जीवाचा देहाशी संबंध असतो त्याहून श्रीपादरूपाने अवतरलेल्या ईश्वराचा संबंध वेगळा आहे. जीव अविद्येच्या योगाने मिथ्याभूत षड्विकारयुक्त देहाशी ममत्वाने बद्ध होतो. याउलट नित्य, मुक्त, शुद्ध, मुक्त आणि सत्य स्वभावाचा भगवंत आपल्या योगमायेने चैतन्यघन असा लीलाविग्रह धारण करतो. साहजिकच त्याचे अधिष्ठान झालेल्या पुण्यक्षेत्रांतल्या निवासाने अनायासच त्याच्या प्रियतम भक्तांचा संग लाभतो. बहुशः भगवद्भक्त भगवंतांचे अधिष्ठानभूत अशा पुण्यक्षेत्रांतच राहतात. त्यामुळे तिथे राहणाऱ्यांना भगवद्गुणांचे श्रवण आणि कीर्तनही घडते. इतर ठिकाणी विघ्नबाहुल्याने न होणारे ध्यानसुद्धां साक्षात् श्रीपादांच्या निवासाने विघ्नरहित होते. अशा रीतीने ध्यानयोग सिद्ध झाला की विनासायास मोक्ष लाभतो. केवळ ज्ञानानेच होणारा मोक्ष, ईश्वराच्या कृपेने ज्ञानाची साधने अनुकूल झाल्याने विनाप्रतिबंध ज्ञानलाभ या क्षेत्रांतून होतो असा भावार्थ आहे.४९. इतरही कोणत्याही स्थानी जे कुणी श्रीपादांच्या चरणकमलांचे स्मरणसुद्धां करतात त्यांचेही ईप्सित मनोरथ ते शीघ्र पुरवितात.५०.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सातवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अष्टमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। अथ अष्टमोऽध्यायः।**

**आठव्या अध्यायी थोर। कथिला नरहरी अवतार। दाउनी बाललीला विचित्र। घेई संन्यासाश्रम पवित्र।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**ब्रह्मन् कुत्रावऽतीर्यासौ किं चकारास्य चेष्टितम् । मायाश्रितस्याप्रमेयं ब्रूहि शुश्रूषवेऽर्थदम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच।।**

**उदग्देशेऽवतीर्णस्य दीनानुद्धर्तुमीशितुः । वक्ष्येऽल्पकं साधुयोगि-दुर्विभाव्यं हि चेष्टितम् ।।२।।**

**या श्रीपादोपदेशेन प्रदोषेऽजमतोषयत् । सा प्रेत्योत्तरदेशे स्त्रीर्जाता ब्रह्मकुलेऽमले ।।३।।**

नामधारक उवाच, (हे) ब्रह्मन्, असौ कुत्र अवतीर्य किं चकार? अस्य माया+आश्रितस्य अप्रमेयं अर्थदं चेष्टितं शुश्रूषवे (मे) ब्रूहि।१। दीनान् उद्धर्तुं उदक् देशे अवतीर्णस्य ईशस्य चेष्टितं अहं अल्पकं वक्ष्ये। (तत्) हि साधु+योगि+दुर्विभाव्यं (अस्ति)।२। या (ब्राह्मणी) श्रीपाद+उपदेशेन प्रदोषे अजं अतोषयत्, सा प्रेत्य उत्तर+देशे अमले ब्रह्म+कुले स्त्रीः जाता।३।

श्रीगुरू भगवंतांच्या दुसऱ्या अवताराविषयी नामधारक प्रश्न करीत आहे. हे द्विजश्रेष्ठा, त्या भगवंतांनी कुठे अवतार घेतला आणि काय लीला केल्या? स्वेच्छेने मायेचा अंगीकार केलेल्या श्रीगुरूंच्या अचिंत्य पण अभीष्टार्थप्रद अशा चरित्राचे श्रवण करण्यास अत्सुक अशा मला आपण सांगा.१. सिद्धमुनी सूत्ररूपाने सांगतात, दीनजनांचा उद्धार करण्यासाठी उत्तरेच्या देशांत (वऱ्हाडांतील कारंजा येथे) अवतरलेल्या प्रभूंचे चरित्र मी किंचिन्मात्र सांगतो; कारण खरोखर त्यांच्या लीला साधूंना आणि योग्यांनासुद्धा आकळण्यास कठीण आहेत.२. (सातव्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे) ज्या ब्राह्मणीने श्रीपादश्रीवल्लभांच्या उपदेशानुसार प्रदोषकाली शिवाची आराधना करून प्रसन्न केले, ती मृत्यू पावल्यानंतर उत्तरेच्या (वऱ्हाड) प्रांतात (कारंजा गांवांत) पवित्र अशा (वैदिक) ब्राह्मण कुळांत स्त्री म्हणून जन्माला आली.३.

**धीरूपशीललक्ष्माढ्या सुसंस्कारा गुणान्विता । श्रीपादेन पुराम्बेति प्रोक्तत्वात्सा तदाह्वया ।।४।।**
**शिववृत्तिं माधवाख्यमनुरूपं द्विजं पिता । दृष्ट्वा तत्रैव तां तस्मै गृह्योक्तविधिना ददौ ।।५।।**
**सा पातिव्रत्यमास्थाय भेजे छायेव तं पतिम् । प्रदोषेऽपि शिवं पूर्व-संस्कारात् पत्यनुज्ञया ।।६।।**
**स्नेहोऽन्योन्याश्रयो भाव-बन्धोऽभूच्चक्रवाकवत् । तयोर्हर्षितयोरेवं गर्भमम्बा वरं दधौ ।।७।।**

(सा) धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्या सुसंस्कारा गुण+अन्विता अभूत्। पुरा श्रीपादेन अम्बा इति प्रोक्तत्वात् तत् आह्वया (प्रसिद्धा अभूत्)।४। पिता तत्र एव शिव+वृत्तिं अनुरूपं माधव+आख्यं द्विजं दृष्ट्वा तां तस्मै गृह्य+उक्त+विधिना ददौ।५। सा तं पतिं पातिव्रत्यं आस्थाय छाया+इव भेजे। पूर्वसंस्कारात् पति+अनुज्ञया शिवं अपि प्रदोषे (भेजे)।६। तयोः चक्रवाकवत् अन्यः+अन्य+आश्रयः स्नेहः भावबन्धः अभूत्। एवं हर्षितयोः तयोः अम्बा वरं गर्भं दधौ।७।

ती सारासारविवेक करणारी बुद्धी, सुंदर रूप, उत्तम स्वभाव आणि सुलक्षणांनी युक्त होती. तिचे संस्कारही चांगलेच होते आणि ती शांती आदि गुणानी मंडित होती. पूर्वजन्मी श्रीपादमुनींनी 'अम्बा' असे संबोधल्याने ह्या जन्मांतही ती त्याच नांवाने ओळखली जाऊं लागली.४. तिथे - कारंजालाच तिच्या वडिलांनी एक तिला अनुरूप असा शिवभक्त, माधव नांवाचा ब्राह्मण पाहून आपल्या या कन्येचे त्याला यथाविधी दान केले.५. त्या अंबेने पातिव्रत्य धर्माला अनुसरून आपल्या पतीची सावलीसारखी सेवा केली. तसेच पूर्वजन्मांतील संस्काराच्या प्रभावाने पतीच्या आज्ञेने प्रदोषकाळांत शंकराची पूजाही करूं लागली. (स्त्रियांनी आपल्या मर्जीने कोणतेच व्रतवैकल्यादि करूं नयेत; पतीच्या आज्ञनेच करावेत असे शास्त्रशासन आहे.)६.

**धर्मानुकूल कामसुख अनिंद्य आहे.** त्या पतिपत्नींत एकमेकांवर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणे प्रेम जडले आणि त्या भावबंधांत ते दृढ बांधले गेले. त्यांच्या वैवाहिक सुखाची परिणती अंबेने श्रेष्ठ असा गर्भ धारण करण्यांत झाली. स्त्रीपुरुषांच्या एक-दुसऱ्याच्या अवयवांच्या संयोगांतून निर्माण होणारा रतिरूप आनंद वेदांनीच प्रतिपादलेला आहे. '(जीवात्मा) आपल्या प्रज्ञेने उपस्थाच्या माध्यमांतून कामसुख आणि प्रजोत्पादन प्राप्त करून घेतो.' (कौषीतकी उ.३:६); तसेच तैत्तिरीय उपनिषदांतही 'प्रजाजनन आणि रतिक्रीडा यांना उपस्थजन्य

**सा सुदोहदलक्ष्माथ तत्त्वज्ञानमुपादिशत् । द्विजोप्यनुक्रमाच्चक्रे क्रियाः पुंसवनादिकाः ॥८॥**
**अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्व-प्रव्रज्यके सुसमयेऽथ समोष्णशीते ।**
**आत्मीयवाच्यपठनेन सतोऽनुगृह्णन्नोङ्कारवाच्यभगवान्स्वयमाविरासीत् ॥९॥**

अथ सुदोहद+लक्ष्मा सा तत्त्वज्ञानम् उपादिशत्। द्विजः अपि पुंसवनादिका क्रियाः अनुक्रमात् चक्रे।८। अ+ब्रध्न(अस्त)+ग+इष्ट+खग+सूचित+सिद्धि+पूर्व+प्रव्रज्यके सम+उष्ण+शीते सुसमये, आत्मीय+वाच्य+पठनेन सतोः अनुगृह्णन् कार+वाच्य भगवान् स्वयं आविरासीत्।९।

आनंद' अशा शब्दांत रतिसुखाला ब्रह्मानंदाचे स्वरूप मानले आहे. भगवद्गीतेनेही धर्माच्या अनुकूल कामाची भगवद् विभूतीत गणना केली आहे. अर्थातच हा काम निंद्य नाही. दधौ या शब्दांतून यथाविधी गर्भाधान या मंत्रोक्त विधीचा संकेत दिला आहे. ही सर्व भक्तपराधीन भगवंताची लीलाच होय.७.

यथाकाल तिला (अंबेला) उत्तम डोहाळे लागले. येणाऱ्या लोकांना ती तत्त्वज्ञानाचा उपदेश करूं लागली. माधवभटजींनीही क्रमशः तिसऱ्या महिन्यांत पुंसवन, अनवलोभन, चौथ्या महिन्यांत सीमंतोन्नयन (आश्वलायन गृह्यसूत्रानुसार) हे संस्कार पार पाडले. पारस्कर गृह्यसूत्रांत सीमंत सहाव्या वा आठव्या महिन्यांत सांगितले आहेत.८. ऋग्वेदाच्या *'दशमे मासि जायत'* या मंत्रानुसार दहाव्या महिन्यांत अंबा प्रसूत झाली. त्या वेळी कोणत्याही ग्रहाचा अस्त नव्हता. (**अब्रघ्नग** = अनस्तंगत) सर्व ग्रह अनुकूल होते आणि सिद्धिपूर्वक संन्यासाचा संकेत देणाऱ्या **प्रव्रज्या** नांवाच्या योगाने युक्त अशा शुभ मुहूर्तावर उष्णता आणि शीत यांचे साम्य असतांना भगवान् स्वतः, आपला वाचक जो प्रणव (ॐकार) त्याचा उच्चार करीत, कलीने त्रस्त असलेल्या साधुजनांवर अनुग्रह करण्यासाठी अवतरले. पतंजलींनी प्रणवाला ईश्वराचा वाचक असे म्हटले आहे (१:२७). कठोपनिषदानुसार (१:२:१७) ॐकार हेच परब्रह्माचे परमश्रेष्ठ आलंबन आहे. ह्या आलंबनाला जाणणारा जे इच्छील ते पावतो.

**विश्वं तदाभूच्छुभशंसि लोका ॐकारमाकर्ण्य सुविस्मिताः स्युः ।**
**भावान्सुखेटान्गणकाः सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुरदृष्टपूर्वान् ।।१०।।**

तदा विश्वं शुभ+शंसि अभूत्। लोकाः ॐकारं आकर्ण्य सुविस्मिताः स्युः। गणकाः अदृष्टपूर्वान् भावान् सुखेटान्, सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुः।१०।

ॐकार हे परात्परब्रह्मच असल्याने, तसेच ब्रह्माचे प्रतीक असल्याने आणि ब्रह्मप्राप्तीच्या सर्व उपायांत श्रेष्ठतम आलंबन (ध्येय) असल्याने भगवंत ॐकारवाच्य आहे. जशी एखादी व्यक्ती आपल्याला प्रिय अशा नांवाने हांक मारल्यानंतर आनंदित होते आणि जवळ येते तसाच परमात्माही आपल्याला प्रिय अशा ॐकाराच्या उच्चाराने प्रसन्न होऊन भक्ताकडे येतो.

**भगवदावतार.** भगवान स्वेच्छेने अवतरले (**स्वयं आविरासीत्**) म्हणजे आपल्यासारखे कर्मरूपी पारतंत्र्याने, शुभाशुभ कर्मांनुसार भौतिक देह धारण करून जन्मले नाहीत. तर श्रीकृष्णादि अवतारांच्या वेळी जसे ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य, तेज आदि ईश्वरी गुणांनी नित्य संपन्न, आपल्या त्रिगुणात्मकी वैष्णवी मायेला वश करून, जन्मादि विकारांनी अस्पृष्ट, अव्यय असा सर्वभूतमहेश्वर असूनसुद्धां, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावानेच आपल्याच मायेने देहधाऱ्यासारखा जन्मल्याचे नाटक करीत, लोकांवर अनुग्रह करण्यासाठी प्रकट झाले. तसेच या वेळी पण आपले असे कांही प्रयोजन नसतांनाही केवळ लोकोद्धारासाठीच, वैदिक धर्माचा उपदेश करण्यासाठीच नरसिंहसरस्वतीरूपाने प्रकटले. राम आणि कृष्ण यांच्या अवताराच्या वेळी जसे त्यांनी आपल्या दिव्य जन्माची सूचना देण्यासाठी आपला अलंकार, चिह्ने आणि आयुधे धारण केलेला सोळा वर्षांचा देह प्रकट केला त्याचप्रमाणे यावेळीही जन्मानंतर रडण्याऐवजी जन्मतःच ॐकाराचा पाठ केला.९.

त्या जन्मकाळी, अग्नी, वायू इत्यादि सर्व विश्व शुभाचे संकेत देत असल्याचे जाणवले. उपस्थित लोक बालकाचे ॐकारपठण ऐकून आश्चर्यचकित झाले. ज्योतिषांना बाळाच्या कुंडलीतील पूर्वी न पाहिलेले शुभ ग्रह, तनु आदि भाव आणि प्रव्रज्यादि योग पाहून परम हर्ष झाला.१०.

**त ऊचुर्माधवेदं ते सुकृतद्रुफलं किल । श्रीसिद्ध्योऽस्य दास्योऽङ्घ्री स्पर्शवन्निधयोऽनुगाः ।।११।।**
**नायं गृही जनोद्धर्ता दृष्ट्या पतितपावनः । वन्द्योऽस्यानुग्रहात्कोऽपि भवेन्नैवात्र संशयः ।।१२।।**
**इत्युक्त्वा तेन हृष्टेन पूजितास्ते गृहं ययुः । श्रुत्वाद्भुतं जनुर्द्रष्टुं प्राप्तैर्लोकैः स नेक्षितः ।।१३।।**
**तद्दृग्दोषभियैकान्ते गुरुः संस्थाप्य रक्षया । तं ररक्षार्भबुद्ध्येशं तन्मायामोहितो हरिम् ।।१४।।**
**भूयान्नरो हरिरिव नरतापाघदैन्यहृत् । अयमित्याख्यया चक्रे बालं नरहरिं द्विजः।।१५।।**

ते ऊचुः, '(हे) माधव इदं किल ते सुकृत+द्रु+फलम्। अस्य श्री+सिद्ध्योः दास्यः, अङ्घ्री स्पर्शवत्, निधयः अनुगाः (सन्ति)।११। अयं गृही न (अस्ति)। जन+उद्धर्ता, दृष्ट्या पतित पावनः अस्ति। अस्य अनुग्रहात् कः अपि वन्द्यः भवेत्। अत्र न एव संशयः।'१२। इति उक्त्वा हृष्टेन तेन पूजिताः ते (गणकाः) गृहं ययुः। (इदं) अद्भुतं जनुं श्रुत्वा द्रष्टुं प्राप्तैः लोकैः स न ईक्षितः।१३। तत्+माया+मोहितः गुरुः तत्+दृक्+दोष+भिया तं हरिं अर्भ+बुद्ध्या रक्षया संस्थाप्य ररक्ष।१४। अयं नरः हरिः इव नर+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात् इति (हेतोः) बालं आख्यया नरहरिं चक्रे।१५।

ते ज्योतिषी माधवाला म्हणाले, अरे माधवा, हा बालक म्हणजे खरोखर तुझ्या पुण्यवृक्षाचे फळच आहे! साक्षात् लक्ष्मी आणि सर्व सिद्धी याच्या दासी आहेत. याचे पाय परीसच आहेत. नऊ निधि यांचे अनुचर आहेत.११. हा गृहस्थ होणार नाही. लोकांचा उद्धारकर्ता होईल. आपल्या दृष्टीनेच पतितांनाही पावन करील. आपल्या अनुग्रहाने हा कुणालाही पूज्यता प्राप्त करून देईल याविषयी मुळीच संशय नाही.'१२. असे जातक ऐकून आनंदित झालेल्या माधवाने त्या ज्योतिष्यांची यथायोग्य संभावना केली आणि ते आपापल्या घरी निघून गेले. ह्या नवलाईच्या जन्माचे वृत्त ऐकून त्या बाळाला पाहायला आलेल्या लोकांना मात्र त्याला पाहतां आले नाही.१३. त्या हरीच्या मायेने मोहित झालेल्या पित्याने त्याला सामान्य बालकच समजून त्या लोकांची दृष्ट लागेल या भीतीने त्याला अंगारा लावून घरांत सुरक्षित ठेवून दिले.१४. हा मानवी बालक श्रीहरीसारखा लोकांचे ताप, पाप आणि दैन्य दूर करणारा होवो (होईल) अशा हेतूने त्याचे नांव नरहरी असे ठेवण्यांत आले.१५.

**क्षुच्छान्तिर्नास्य मत्तोऽतो धात्री वाजा पयस्विनी । मृग्येत्युक्तेऽम्बयोरोजौ स्पृष्ट्वार्भोऽध्यदुहत्पयः ।।१६।।**
**तद्बालचेष्टितं चित्रं सद्दृग्दोषभियानया । स्फुटं नाकारि मात्रैवमन्यदप्यद्भुतास्पदम् ।।१७।।**
**बाल्यादिना मर्त्यलिङ्ग-भाजीहाज्ञानलक्ष्मणाम् । प्रतीतेर्ब्रह्मतारोपः साक्षात्कैः कल्प्यते कथम् ।।१८।।**
**जातस्त्रैवार्षिकोऽप्येष लीलयाभूत्सुमूकवत् । खिन्नाऽतस्तत्प्रतीकारानारेभेऽम्बा द्विजोदितान् ।।१९।।**
**सौर्येऽह्न्यश्वत्थपत्रेऽन्न-भोजनैः कुलपार्चनैः । बालोक्तिपाठनैश्चान्यैः सूपायैर्नावदच्छिशुः ।।२०।।**

अस्य क्षुत्+शांतिः मत्तो न भवति अतो धात्री वा पयस्विनी अजा मृग्या इति अम्बया उक्ते उरोजौ स्पृष्ट्वा पयः अधि+अदुहत्।१६। तत् चित्रं बाल+चेष्टितं अनया मात्रा सत्+दृक्+दोष+भिया स्फुटं न+अकारि। एवं अन्यत् अपि अद्भुतास्पदं (स्फुटं न अकारि)।१७। इह मर्त्य+लिङ्ग+भाजि बाल्यादिना अज्ञान+लक्ष्मणाम् प्रतीतेः साक्षात् ब्रह्मता+आरोपः कैः कथं कल्प्यते?।१८। एषः त्रैवार्षिकः जाता अपि लीलया सु+मूक+वत् अभूत्। ततः खिन्ना अम्बा द्विज+उदितान् तत्+प्रतीकारान् आरेभे।१९। सौर्ये अह्नि अश्वत्थ+पत्रे अन्न+भोजनैः, कुल+प+अर्चनैः, बाल+उक्ति+पाठनैः, अन्यैः च सु+उपायैः शिशुः न अवदत्।२०।

'ह्या बाळाची भूक (माझे दूध कमी पडल्याने) माझ्याकडून शमत नाही. याच्यासाठी एखादी दुधाची आई किंवा एखादी दुभती शेळी शोधावी.' असे आपल्या आईचे बोलणे ऐकून त्या बाळाने आपल्या हातांनी तिच्या स्तनांना स्पर्श केला. त्याबरोबर तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा वाहूं लागल्या.१६. त्या लेकराने केलेला तो चमत्कार त्या मातेने साधूंचीही दृष्ट लागेल अशा भीतीने प्रकट केला नाही. त्या बाळाचे तसेच आणखीही चमत्कार तिने उघड केले नाहीत. यावरून भगवंताच्या लीला अनंत आहेत हेच सूचित केले आहे.१७. या भूलोकावर अवतरून बाल्य आदि मानवरूपाची चिह्ने धारण केलेल्या बाळाच्या अज्ञानाच्या लक्षणांचा प्रत्यय येत असतांना त्याच्याविषयी हा साक्षात् परब्रह्म आहे अशी कल्पना कुणाला कशी येऊं शकेल?१८. हा मुलगा तीन वर्षाचा होऊनही स्वेच्छेने कांहीही न बोलतां अगदी मुक्यासारखा झाला. त्यामुळे खिन्न झालेल्या आईने ब्राह्मणांना विचारून त्यावर उपाय सुरूं केले.१९. शनिवारी (किंवा रविवारी; **सौरि**=शनि; सूर्य=रवि) पिंपळाच्या पानांत अन्न वाढून जेवविण्याने, कुलस्वामीच्या पूजनाने, त्याच्याबरोबर बोबडे बोल बोलून शिकवल्याने आणि ब्राह्मीवचाचे सेवन आदि अशाच दुसऱ्या प्रभावी उपायांनीसुद्धां तो शिशु कांही बोललाच नाही.२०.

**वक्तुं श्रोतुं नायमज्ञो मूकश्चेत्कथमोङ्कृतिम् । श्रुत्वान्योक्तिं ब्रूत इति पितरौ मोहमापतुः ।।२१।।**
**मूकोऽयं नौ श्रमेणालं प्रदोषे शम्भुरर्चितः । दिष्ट्यैतत्फलं प्राप्तं संस्कार्योऽसौ कथं न्वतः ।।२२।।**
**ताभ्यामित्युदिते मौञ्ज्यां बद्धायां वक्ष्य इत्यसौ । संज्ञया दर्शयत्स्वर्णं व्यकृणोत्तन्मुदेऽयसः ।।२३।।**
**तदा सञ्जातविश्वासो विप्रानाहूय माधवः । मुदा संभृतसंभारः सुलग्नेऽमुमुपानयत् ।।२४।।**

अयम् वक्तुं श्रोतुं च न अज्ञः। मूक इति चेत् अन्य+उक्तिं श्रुत्वा कथं ॐ कृतिं ब्रूते? इति पितरौ मोहं आपतुः।२१। अयं मूकः (अस्ति)। नौ श्रमेण अलम्। प्रदोषे शम्भुः अर्चितः तत् एतत् दिष्ट्या फलं प्राप्तम्। नु अतः असौ कथं न संस्कार्यः?।२२। ताभ्यां इति उदिते असौ मौञ्जायां बद्धायां वक्ष्ये इति संज्ञया दर्शयत्। तत्+मुदे अयसः स्वर्णं व्यकृणोत्।२३। तदा सञ्जात+विश्वासः माधवः मुदा संभृत+संभारः विप्रान् आहूय सुलग्ने अमुम् उपानयत्।२४।

याला ऐकायला किंवा बोलायला येत नाही असे नाही. मुका म्हणावा तर इतरांचे बालणे ऐकून हा 'ॐ' असे उत्तर कसे देतो? असा त्याच्या मातापित्यांना संभ्रम पडला.२१. ते म्हणाले, 'इतके उपाय करूनही हा कांहीच बोलत नाही त्या अर्थीं हा मुकाच असावा. प्रदोषकाळी शंकराची पूजा केल्याचे हे चांगले पुत्ररूप फळ आम्हांला मिळाले! तो दुर्दैवाने मुका मिघाला. तरी आतां त्याच्यावर मौंजीबंधनादि संस्कार न करून कसे चालेल?'२२. आपल्या आईवडिलांचे हे संभाषण ऐकून ह्या मुलाने त्यांना खुणेने दाखविले कीं, 'मी मौञ्जीबंधनानंतर बोलेन.' त्यांची खात्री पटविण्यासाठी त्यानें आपल्या हस्तस्पर्शानेच परीसाप्रमाणे लोखंडाचे सोने करून दाखविले. विधिवत् संस्कारून स्वस्तिवाचन केल्यावर बटूने मातृभोजन केले. २३. त्या वेळी माधवाचा विश्वास बसला आणि त्याने आनंदाने सर्व सामग्री जमवून शुभ मुहूर्तावर ब्राह्मणांना बोलावून ह्या आपल्या पुत्राची मुंज लावली. मुंज अर्थात् उपनयन म्हणजे आचार्यांजवळ नेणे हे अंगभूत असलेले आणि गायत्रीचा उपदेश प्रधान असलेले विशेष कर्म. उपनयन हे पद योगरूढ आहे. २४.

**सुसंस्कृतः कृतस्वस्त्ययनो भुक्तोऽम्बया सह । गुरूपदिष्टां सावित्रीमुपनीतोऽयमाददे ।।२५।।**
**गुर्वाश्रितब्रह्मचारि-धर्मो भिक्षां स मातरम । याचयित्वा जगौ वेदान्न चित्रं वेदवाच्यदः ।।२६।।**
**प्रणम्य पितरौ प्राह विरक्तः प्रव्रजामि भोः । अनित्याद्द्राक्शरीरस्य तदाज्ञां दातुमर्हथः ।।२७।।**

सु+संस्कृतः कृत+स्वस्ति+अयनः अम्बया सह भुक्तः उपनीतः गुरु+उपदिष्टां सावित्रीं आददे।२५। गुरु+आश्रित+ब्रह्मचारि+धर्मः सः मातरम् भिक्षां याचयित्वा वेदान् जगौ। (इदं) न चित्रं, अदः वेदवाचि।२६। पितरो प्रणम्य (सः) प्राह भोः! अहं विरक्तः शरीरस्य अनित्यत्वात् द्राक् प्रव्रजामि। तत् (युवां) आज्ञां दातुं अर्हथः।२७।

त्यानंतर मुंज लावून - द्वितीय जन्माचे द्योतक असलेली वस्त्र आणि जानवे घालून, गुरूंजवळ जाऊन त्यांनी कानांत उपदेशिलेला उपदेशः - अर्धा-अर्धा आणि संपूर्ण गायत्री मंत्र स्वीकारून उच्चारला.२५. 'तूं आतां ब्रह्मचारी आहेस, दिवसां न झोपतां आचार्यांच्या अधीन राहून वेदांचे अध्ययन करावे, सकाळ-संध्याकाळ भिक्षा मागावी, सकाळ-संध्याकाळ समिधा आणाव्यात' (आश्वलायन गृह्यसूत्र १:२२:२-५) इत्यादि ब्रह्मचारी धर्मांचे गुरूंकडून श्रवण करून, आईजवळ त्याप्रमाणे भिक्षा मागितली आणि ऋक्, यजुः आणि साम या तीनही वेदांचे पठण केले. ऋग्वेदी ब्राह्मणांत वेदांचे प्रथम उपाकरण (वेदाध्ययनाचा आरंभ) उत्तरायणांत करण्याचा नियम असतो, तसा श्रीगुरूंनी अवतार घेतलेल्या वाजिसनेयि शाखेत नसतो. त्यामुळे उपनयनानंतर लगेच वेदपठण करणे योग्यच होय. नुकतीच मुंज झालेल्या, कसलाही अभ्यास न केलेल्या त्या बटूने वेदपठण केले यांत कांही आश्चर्य मानण्याचे कारणही नाही. कारण सर्व वेद ज्यांची निःश्वसिते आहेत अशा महद्भूताचा अवतार ते आहेत (बृहदारण्यक उपनिषद २:४:१०).२६. नंतर त्या बटूने माता-पित्यांना वंदन केले आणि म्हणाले, 'मी विरक्त आहे. शरीर अनित्य आहे. त्याचा क्षणाचाही भरंवसा नाही. ते पडण्यापूर्वीच ज्ञान झाले तरच मोक्ष मिळतो. अन्यथा कठोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (२:३:४) पुनश्च जन्म घ्यावा लागतो. त्यासाठी मी लगेच शास्त्राच्या आज्ञेनुसार श्रवणादींच्या अनुष्ठानासाठी संन्यास घेत आहे. तरी आपण मला आज्ञा द्यावी.'२७.

**प्रत्यवायाभिक्रमान्तो नैव धीमति धीस्त्वियम । मम प्राग्दैहिकाक्षय्या भविष्यन्त्यात्मजा हि वाम् ॥२८॥**
**इत्युक्तेऽम्बा विषीदन्ती तन्मायामोहिताऽब्रवीत् । एक एव सुतस्त्वं मे कथं यासि विहाय माम ॥२९॥**
**प्रव्रजेद्वेदविद्भुक्त-गार्हस्थ्योऽनुक्रमाद्वनात् । तत्त्वविद्वासनानाश-मनोभङ्गा अतः श्रुताः ॥३०॥**

धीमति प्रत्यवाय+अभिक्रम+अन्तौ न एव। इयं मम धीः प्राक्+दैहिका अक्षय्या। वां आत्मजा भविष्यन्ति हि।२८। इति उक्ते तत्+माया+मोहिता अम्बा विषीदन्ती अब्रवीत्। त्वं मे एक एव सुतः। मां विहाय कथं यासि?२९। वेदवित् भुक्त+गार्हस्थ्यः अनुक्रमात् वनात् प्रव्रजेत्। अतः तत्त्ववित्+वासना+नाश+ मनो+भङ्गाः श्रुताः।३०।

आपल्या गृहत्यागाच्या प्रस्तावाला आईवडिलांचा विरोध असणार याची जाणीव असलेले बाल नरहरी पुढे म्हणाले, 'ब्रह्मचर्याश्रमांत स्वाध्यायाचे अध्ययन करावे (शतपथ ब्राह्मण ११:५:३) अशी वेदांची आणि ब्राह्मणाने संपूर्ण वेदांचे सरहस्य ज्ञान करून घ्यावे शास्त्रांचीही (मनुस्मृति २:१६५) आज्ञा आहे. स्वाध्यायाचा परित्याग करून ती आज्ञा पालन न केल्याने ऋषींच्या ऋणाची फेड न केल्याचा प्रत्यवाय दोष लागेल; तसेच वैराग्याच्या अभावी हा जो संन्यासाचा अभिक्रम (आरंभ) केला आहे त्याचाही नाश होईल. (बृहदारण्यक उपनिषदाच्या भाष्यावरील वार्तिकांत १:४:१५८४ म्हटल्याप्रमाणे) कलियुगांत बहुसंख्येने आढळणाऱ्या भरकटलेल्या, भांडकुदळ, दुश्चित्त, परनिंदापर संन्याशांत भर पडेल; असे तुम्हांला वाटूं देऊं नका. कारण मी विवेकशील बुद्धीने हा निर्णय घेत आहे. ही बुद्धी माझी पूर्वजन्मार्जित आणि अक्षय आहे. मी संन्यास घेतल्यावर तुमची गती काय असें विचाराल तर तुम्हांला आणखी पुत्र होणार आहेत.'२८. असे आपल्या मुलाचे भाषण ऐकून त्याच्याच मायेने भुललेली आई दुःखाने कळवळून म्हणाली. 'अरे, तूं माझा एकुलता एक मुलगा आहेस. असा कसा मला सोडून जातोस?२९. आधी ब्रह्मचर्याश्रमांत वेदांचा अभ्यास करावा, मग गृहस्थाश्रमांतील सुखांचा उपभोग घेऊन वानप्रस्थ आश्रम घ्यावा आणि मग संन्यास घेऊन तत्त्वज्ञान, वासनाक्षय आणि मनोभंग साधावेत असाच क्रम आमच्या ऐकण्यात आहे. किंवा असाच क्रम श्रुतिसंमत आहे.'३०.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**जैह्व्यौपस्थ्यसुखाक्तानां क्रमोऽयं नैव मादृशः । प्राक्संस्कारविरक्तस्य जोष्यैः किं मेऽकयोनिभिः ।।३१।।**
**श्रुतश्रोतव्यनिर्वेदं यास्ये संन्यस्य भो ततः । संसिद्धिः सुलभा नातः परं कार्यं हि धीमता ।।३२।।**
**कलावायुः शतं स्वापाद्-ध्रियतेऽर्धं तु शेषकम् । बाल्ययौवनवृद्धत्वैः पराधीनतया च नुः ।।३३।।**

श्रीगुरुः उवाच। जैह्व्य+औपस्थ्य+सुखाक्तानां अयं क्रमः। मादृशः न एव। प्राक्+संस्कार+विरक्तस्य मे अक+योनिभिः जोष्यैः किम्?३१। भो, संन्यस्य श्रुत+श्रोतव्य+निर्वेदं यास्ये। ततः सिद्धिः सुलभा हि अतः परं धीमता न कार्यम्।३२। कलौ नुः आयुः शतम्। अर्धं स्वापात् ऱ्हियते। शेषकं (अर्धं) तु बाल्य+यौवन+वृद्धत्वैः पराधीनतया (ऱ्हियते)।३३।

यावर श्रीगुरू उत्तर देत आहेत. 'जिह्वेने मिळणारा रसास्वाद आणि लिंगाने मिळणारे कामसुख (हे सर्वच ऐंद्रिय सुखांचे उपलक्षण आहे) यांची आसक्ती असणाऱ्यांसाठी हा तूं सांगितलेला क्रम आहे. माझ्यासारख्यासाठी नाही. पूर्वसंस्कारांमुळे विरक्त असलेल्या मला या दुःखमूलक विषयांचे काय प्रयोजन? या विषयांच्या उपभोगाच्या काळांतही स्पर्धा, असूयादि उपसर्ग असतातच. विवेकशील माणसाला सगळाच संसार दुःखरूपच आहे असे पतंजलींचे सूत्र आहे (*'सर्वमेव दुःखं विवेकिनाम्।'* २:१५) म्हणून संन्यास घेऊन ज्ञात आणि अज्ञात अशा सर्व अग्राह्य विषयांपासून मन काढून मी जात आहे. निर्वेद म्हणजे दुःखबुद्धीने विषयांसंबंधी उदासीनता. अशा रीतीने संन्यास घेतल्यावर मनुष्यजन्माचे परमसाध्य जो मोक्ष तो सुलभ होतो. म्हणून शहाण्याने यापेक्षां वेगळे कांही करूं नये.३२. 'कलियुगांत माणसाची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची सांगितली आहे. त्यांतील अर्धी झोपेतच जाते. उरलेल्या अर्ध्या भागांत बालपण, यौवन आणि वार्धक्य यांच्यांत अनुक्रमे मातापिता, पत्नी आणि पुत्रपौत्र (दुहिता-दौहित्र) यांच्या अधीनतेत जाते (*'पितृमातृमयो बाल्ये यौवने वनितामयः। पुत्रपौत्रमयो वार्द्ध्ये मूढो नात्ममयः क्वचित्।।'* गरुडपुराण-प्रेतखंड-धर्मकांड १२:१९).३३.

**स्वप्नवत्सम्पदिष्टाढ्य-संसारोऽज्ञानकल्पितः । यौवनं पुष्प वच्चायुस्तडिद्वत् क्व धृतिर्बुधे ।।३४।।**
**कालो भ्रूणाञ्छिशून्यूनो वृद्धानार्तान्सुखस्थितान् । मूढान् ग्रसत्यपि प्राज्ञान्निःशेषानमरानपि ।।३५।।**
**यदर्थं ममताप्येतज्जलबुद्बुदवद्वपुः । मांसास्थिरक्तवद्धिंस्र-वञ्चनार्थं त्वगावृतम् ।।३६।।**

अज्ञानकल्पितः सम्पत्+इष्ट+आढ्य+संसारः स्वप्नवत् (अस्ति)। यौवनं पुष्पवत्; आयुः तडित्+वत्। बुधे क्व धृतिः?३४। कालः भ्रूणान्, शिशून्, यूनः, वृद्धान्, आर्तान्, सुखस्थितान्, मूढान्, प्राज्ञान् अपि निःशेषान् अमरान् अपि ग्रसति।३५। यदर्थं ममता (क्रियते) एतत् अपि वपुः जल+बुद्बुदवत्। मांस+अस्थि+रक्त+वत् हिंस्र+वंचनार्थं त्वक्+आवृतम्।३६।

अज्ञानाने भासणारा हा संपत्ती, आप्त, इष्ट इत्यादींनी युक्त असा संसार स्वप्नासारखा मिथ्या आहे. यौवन हे फुलासारखे लगेच कोमेजणारे आहे. आकाशांत चमकून जाणाऱ्या विजेसारखे हे आयुष्य क्षणभंगुर आहे. शहाण्याने यांतील कशाचा भरंवसा धरावा? हे मानवी जीवन बिनभरंवशाचे आहे असा भावार्थ.३४. इथे काळ (मृत्यू) गर्भांतल्या भ्रूणापासून सर्वांच्या मागे लागलेला आहे. बाल, तरुण, वृद्ध, दुःखी, सुखी, मूर्ख, शहाणा या सर्वांचा, अगदी देवांचाही तो ग्रास करतोच. कुणालाही सोडत नाही.३५.

**नाशिवंत देह -** ज्या देहामुळे सर्व 'माझे' वाटतात तो देहसुद्धां पाण्यावरील बुडबुड्यासारखा अशाश्वत आहे. मांस, अस्थी, रक्त अशा घृणास्पद पदार्थांचा बनलेला आणि लांडगे, कोल्हे, कावळे अशा हिंस्र प्राण्यांपासून रक्षण करण्यासाठी कातडीत गुंडाळलेला आहे. शतश्लोकींत (४) भ.पू.पा. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे बाहेरून हाडे, स्नायू, मज्जा, मांस, रक्त, चरबी आणि त्वचा यांनी घडलेला आणि आंत विष्ठा, मूत्र आणि श्लेष्म यांनी भरलेला असा हा किळसवाणा देह धारण करण्याइतके वैराग्याला प्रभावी निमित्त शोधून सांपडणार नाही.३६.

**न भस्मविट्कीटरूप-परिणामं निजानुगम् । तदानुषङ्गिकाः स्त्र्याद्याः किमुतानर्थहेतवः ।।३७।।**

भस्म+विट्+कीट+रूप+परिणामं (वपुः) न निज+अनुगम्। तत्+आनुषंगिकाः अनर्थ+हेतवाः स्त्री+आद्याः किम् उत?३७। गरुडपुराणाच्या वचनानुसार (प्रेतखंड-धर्मकांड १९:१८) मरणोत्तर ह्या शरीराचे, पुरले तर कृमी, जाळले तर भस्म आणि हिंस्र प्राणांनी खाल्ले तर विष्ठा अशा रूपांत परिवर्तन होते. हे कांही आपल्याबरोबर लोकांतरी किंवा जन्मांतरी येत नाही. गरुडपुराणांतच (प्रेतखंड-धर्मकांड १२:२४-२७) पुढे असे म्हटले आहे की जीवाने शरीर सोडल्यानंतर ते भूमीवर दगडा-लाकडासारखे अचेतन होऊन तिथेच पडते; हा जीव आपण केलेले शुभाशुभ कर्म तेवढे बरोबर घेऊन जातो. मित्र आणि भाऊबंद स्मशानापर्यंत येऊन परत जातात आणि शरीराला अग्नी जाळून टाकतो. जाणाऱ्या जीवासोबत फक्त त्याने केलेले पाप-पुण्यच जाते. ही जर देहाची कथा आहे तर देहाच्या अनुषंगाने आपले वाटणाऱ्या, अनर्थालाच कारण असणाऱ्या स्त्रीपुत्रादीविषयी बोलायलाच नको!३७.

**देह आणि जीव -** हा देह पंचभूतांचा घडलेला, विकारशील (जन्म, वाढ, अस्तित्व, परिणाम, क्षय आणि नाश हे विकार असलेला) आणि इंद्रियांना प्रतीत होणारा - म्हणजेच घटासारखा जड आहे. जीव हा गीतेच्या वचनानुसार (१५:१७) चैतन्याचा अंश आहे; अविनाशी आहे; तो आकाशासारखा सर्वव्यापी आहे; आकाश जसे घट-मठादि उपाधींनी बंदिस्त झाल्यासारखे भासते पण तसे नसते, तसाच देहादि उपाधींनी बद्ध वाटणारा जीव वस्तुतः तसा नसतो. कठोपनिषदाच्या वचनानुसार (१:२:१८) जन्मादिविकाररहित आहे. मग तो संसारांत पडून सुखदुःखांचा भोग कसा घेतो, असे कुणी म्हणेल, तर त्याचे उत्तर असे आहे की त्याचा सुखदुःखाशी जाणवणारा संबंध अज्ञानमूलक आणि स्वप्नवत् आहे. 'तु' शब्दातून छांदोग्य उपनिषदांतील (६:३:२) जीवरूपाने प्राणिमात्रांत प्रवेशून नामरूपांची अभिव्यक्ती करण्याच्या ईश्वरी संकल्पाचा संकेत आहे. आतां अशी शंका उपस्थित होते की सर्वज्ञ ईश्वर जाणूनबुजून लक्षावधी अनर्थांचे मूळ असलेल्या देहांत प्रवेश करून दुःख भोगण्याचा संकल्प कसा करील?

**देहोऽचित्सर्वगो जीवश्चिदंशोऽजोऽव्ययो ध्रुवः । स्वप्नवत्सुखदुःखादि-संबन्धोऽज्ञानजोऽस्य तु ।।३८।।**

देहः अचित्। चिदंशः जीवः अजः अव्ययः। अस्य सुख+दुःख+आदि संबंधः तु अज्ञान+जः स्वप्न+वत्।३८।

शंका बरोबर आहे. आपल्या अविकृत रूपाने अनुप्रवेश करून दुःख भोगीन असा ईश्वराचा संकल्प नाही. जीव हा बुद्धी, मन, प्राण, इंद्रिये इत्यादि उपाधींत पडलेले केवळ ईश्वराचे प्रतिबंब आहे. आरशांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासारखे. अचिंत्य अनंतशक्तिमान आत्म्याचा बुद्ध्यादिकांत होणारा फक्त आभास आहे. आत्मस्वरूपाचा विवेक न केल्याने तो सुखी, दुःखी, मूढ इत्यादि भासतो. जसे आरशांत पडलेले माणसाचे किंवा पाण्यांत पडलेले सूर्याचे प्रतिबिंब आरशावरील मळाने मळल्यासारखे वाटते, आरशावरील तड्याने फुटल्यासारखे दिसते किंवा पाण्याच्या हलण्यामुळे विकृत झालेले दिसते तसेच हे आहे. मूळ बिंब - माणूस किंवा सूर्य, यांच्यावर त्याचा कांहीच परिणाम होत नाही. कठोपनिषदाच्या (२:२:११) प्रतिपादनानुसार सर्व जगाचा नेत्र असलेला सूर्य जसा त्या जगांतील दोषांनी दूषित होत नाही त्याचप्रमाणे भूतमात्रांचा अंतर्यामी बाह्य जगतांतील दुःखांपासून अलिप्त असतो. बृहदारण्यक उपनिषदांत (१:३:७) म्हटलेच आहे की हा आत्मा चिंतन करीत असल्यासारखा किंवा हालचाल करीत असल्यासारखा दिसतो. वस्तुतः चिंतन वा हालचाल हे त्याचे गुण नसतात.

**जीवाचे सत्यत्व -** मृत्तिकेची बाहुली, मृत्तिकेचा घट, मृत्तिकेचे पात्र या सर्वांत मृत्तिका हेच सत्य आहे. घट, पात्र, बाहुली इत्यादि मृत्तिकेचेच विकार आहेत. त्या विकारांना शब्दांत व्यक्त करण्यासाठी नांवे दिलेली आहेत (छांदोग्य उपनिषद ६:१:४). त्याचप्रमाणे आत्माच सत्य आहे आणि सर्व जीव हे विकार आहेत असे मानले तर मग सगळे जीव लटकेच म्हणावे लागतील आणि इहलोक, परलोक इत्यादीसुद्धां खोटे ठरतील. हा आक्षेप बरोबर नाही; कारण आत्मा सत्य आहे आणि त्याच्या अधिष्ठानामुळे जीवादि विकारांनाही सत्यत्व येते. आत्म्याचे अधिष्ठान नसेल तर ते आपल्या ठिकाणी असत्यच आहेत. सद्रूप आत्म्यामुळे सर्व व्यवहारांना सर्व विकारांना सत्यत्व आहे. अन्यथा ते खोटेच आहेत. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांच्या छांदोग्य उपनिषदाच्या ६:३:२ या मंत्रावरील भाष्याचा आधार घेतला आहे.३८.

**प्रसादात्सद्गुरोः शाब्द-परब्रह्मविदस्त्विदम् । छित्त्वाऽविद्गहनं ज्ञेय-ज्ञानास्त्रः स्वस्थ इद्भवेत् ।।३९।।**
**य उत्तमं ज्ञानपात्रं लब्ध्वा धामाग्रजातिजम् । नाचरत्यात्मनः श्रेयस्तेनात्मा वञ्चितो ध्रुवम् ।।४०।।**
**तस्मान्नारब्धविध्ना मे भव तेऽम्ब नमोऽपि ते । पुत्रो भविष्यति ध्यानाद् भवाब्धिं मे तरिष्यसि ।।४१।।**

शाब्द+परब्रह्म+विदः सद्गुरोः प्रसादात् ज्ञेय+ज्ञान+अस्त्रः इत् इदं तु अवित्+गहनं छित्त्वा स्वस्थः भवेत्।३९। यः उत्तमं ज्ञान+पात्रं अग्र+जातिजं धाम लब्ध्वा आत्मनः श्रेयं न आचरति, तेन आत्मा ध्रुवं वंचितम्।४०। हे अम्ब! तस्मात् मे आरब्ध+विघ्ना न भव। ते नमः। अपि ते पुत्रो भविष्यति। मे ध्यानात् भवं तरिष्यसि।४१।

**सद्गुरूंची आवश्यकता -** जीवाचा सुखदुःखाशी असलेला संबंध अज्ञानजन्य आहे तर मग ह्या अज्ञानाचा परिहार कशाने होईल ज्यायोगे पुरुष कृतार्थ होतो? आत्म्याविषयीचे औपनिषद शब्दज्ञान तसेच परब्रह्माशी एकरूप होऊन झालेले विज्ञान ज्याला झाले आहे अशा म्हणजे श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंच्या प्रसादाने म्हणजेच श्रवणादि उपदेशाने हे अज्ञान दूर होते. आचार्यवान् म्हणजे गुरू असलेल्या पुरुषाला ज्ञान होते असे छांदोग्य उपनिषदाचे (६:१४:२) प्रतिपादन आहे. यावर कुणी असे म्हणेल की पद, वाक्य, प्रमाण यांचे ज्ञान असलेला कुणीही हे उपनिषदांतील शब्दज्ञान स्वतःच्या विचाराने प्राप्त करूं शकतो. तिथे सद्गुरूंचे काय प्रयोजन? याचे कारण असे आहे की हातांत समिधा धारण करून श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जाऊन ज्ञान मिळविण्याचाच, वेदांनी उपदेश (मुंडक उ. १:२:१२) केला आहे. छांदोग्यांतील (६:१४:२) दृष्टांताप्रमाणे गंधार देशाचा रहिवासी चोरांनी डोळ्यांवर पट्टी लावून बांधून ठेवल्यांने विवेकहीन आणि दिङ्मूढ होतो; तहानभुकेने व्याकुळ होतो; अरण्यांतील हिंस्र पशु, वाटमारे इत्यादि अनेक अनर्थांच्या भीतीने अर्धमेला होतो. त्यां वेळी त्याला स्वतःला आक्रोशाशिवाय कांहीच करतां येत नाही. असा तो दुःखार्त आणि अगतिक 'कुणी तरी येऊन आपली यांतून सुटका करावी' अशी तळमळ करीत उभा असतो. अशा वेळी कुणी तरी दयाळू माणूस येऊन त्याला बंधनांतून सोडवून त्याचे डोळे उघडतो. मग त्यानं सांगितलेल्या गंधार देशाच्या वाटेने जाऊन आपल्या घरी जाऊन सुटकेचा निःश्वास टाकून सुखी होते.

**इत्युक्त्वाऽदर्शयत्तस्यै स्वं रूपं दिव्यमुत्तमम् । साप्यदभ्रदृशा दृष्ट्वा तद्वित्तत्प्राग्जनिर्जगौ ।।४२।।**
**नमस्ते भगवन्देव प्राग्दृष्टो मर्तुकामया । कुपुत्रया मया स त्वं श्रीपादो मेऽद्य गोचरः ।।४३।।**

इति उक्त्वा तस्यै स्वं दिव्यं उत्तमं रूपं अदर्शयत्। सा अपि अदभ्र+दृशा दृष्ट्वा तत्+वित् तत्+प्राक्+जनिः जगौ।४२। (हे) देव! भगवन्! नमस्ते! प्राक् मया कुपुत्रया मर्तुकामया दृष्टः (यः) श्रीपादः सः त्वं अद्य मे गोचरः।४३।

त्याचप्रमाणे सच्चिदानंद जगदात्मनाच्या आपल्या नित्य स्वरूपापासून भ्रष्ट झालेला हा जीवात्मा आकाश, तेज आदि महाभूतांपासून झालेल्या आणि वात, पित्त, कफ, रक्त, मांस, रुधिर, मेद, मज्जा, शुक्र, कृमी, मल-मूत्र यांनी व्याप्त अशा या देहरूपी अरण्यांत शीत-ऊष्ण अशा अनेक द्वंद्वांच्या दुःखांनी गांजलेला, विवेकरूपी डोळ्यांवर मोह नांवाची पट्टी बंधल्याने अंध झालेला, पत्नी, पुत्र, बंधू, पशू अशा अनेक विषयांच्या तृष्णारूपी पाशाने बद्ध असलेला, पापपुण्यरूपी चोरांच्या तावडीत सांपडून, 'मी हा अमुक', 'हे माझे पुत्र', 'हे माझे बांधव', 'मी सुखी आहे', 'मी दुःखी आहे', 'मी मूर्ख', 'मी पंडित', 'मी जन्मलो', 'मी मेलो', 'मी म्हातारा', 'मी पापी', 'माझा मुलगा मेला', 'माझे धन गेले', 'माझा घात झाला', 'आतां मी कसा जगूं?', 'माझी काय गती?', 'मला कोण वांचवील?' अशा सहस्रावधी अनर्थांच्या जाळ्यांत सांपडलेल्या जीवाला कांही पूर्वपुण्याईमुळे, परमकृपाळू, शब्दज्ञानाने व्युत्पन्न आणि परब्रह्माच्या साक्षात्कारी जीवन्मुक्त सद्गुरूंची भेट होते. त्यांनी परमकारुण्याने संसारांतील दोष दाखवून दिल्याने तो पुरुष विरक्त होतो. मग ते दयाघन सद्गुरु त्याला 'तूं अमका, पुत्रादि युक्त संसारी नाहीस तर ते (ब्रह्म) तूं आहेस' असा उपदेश करून अविद्यारूपी मोहाची पट्टी सोडून त्याचे विवेकरूपी नेत्र उघडतात. त्यासाठी गीतेत निरूपिलेले जे **ज्ञेय** (१३:१२) अनादिमान् परब्रह्म आणि त्याच्या प्राप्तीची अमानित्वादि अठरा **ज्ञान**साधने ही **अस्त्रे** त्याला सद्गुरूंकडूनच मिळतात. त्यांनी गाढ अविद्येचा छेद करून तो स्वस्थ- आत्मस्वरूपांत स्थिर, होतो.३९. जो हा आत्मज्ञानाला योग्य असा ब्राह्मण देह मिळूनही आत्मकल्याणाचे साधन करीत नाही तो स्वतःची मोठीच फसवणूक करून घेतो.४०.

**ब्रह्मापि वेत्ति नो रूप-गुणांस्तु मोहिता त्वहम् । मानुषी त्वां कथं जाने दिष्ट्याद्य ज्ञानमर्पितम् ।।४४।।**
**कृतं मत्कुक्षिसंभूत इति लोकविडम्बनम् । अज ब्रह्माण्डकुक्षे न उभयं पावितं कुलम् ।।४५।।**

(तव) रूप+गुणान् तु ब्रह्मा+अपि नो वेत्ति। अहं तु मोहिता मानुषी त्वां कथं जाने? दिष्ट्या अद्य ज्ञानं अर्पितम्।४४। (हे) अज! ब्रह्मांडकुक्षे! मत्+कुक्षि+संभूत इति लोक+विडंबनं कृतम्। नः उभयं कुलं पावितम्।४५।

आई! तेवढ्यासाठी माझ्या ह्या उपक्रमाला अडसर होऊं नकोस. मी तुला नमस्कार करतो. आणि तुला आणखी मुलगा होईल. तसेच माझ्या ध्यानाने तूं हा भवसागर तरून जाशील.४१. असे बोलून श्रीगुरूंनी तिला (मातेला) आपले दिव्य परमश्रेष्ठ रूप दाखविले. तीसुद्धां ते रूप जाणून - पूर्वजन्मी आपल्याला वर देणाऱ्या भगवान श्रीपादवल्लभांना ओळखून म्हणाली.४२. 'देवा, भगवंता! आपल्याला नमस्कार असो.४३. पूर्वजन्मी मी मूढ पुत्राच्या दुःखाने त्रासून आत्महत्या करीत असतांना मला दर्शन देणारे श्रीपादच आपण आज मला आपल्या दर्शनाने कृतार्थ करीत आहांत. मी असा आहे हे तुला आधीपासूनच (माझ्या जन्मापासूनच) कसे कळाले नाही? असे विचारशील तर तुझे रूप आणि गुण साक्षात् ब्रह्मदेवालाही कळत नाहीत. मी तर तुझ्या मायेने मोहित झालेली एक सामान्य स्त्री आहे. माझ्या परमभाग्याने आज मला हे (तुझ्या रूपगुणांचे) ज्ञान अर्पण केले आहेस.४४.' 'असा जर मी आहे तर तुझा मुलगा कसा झालो?' असा प्रश्न अपेक्षून ती माता म्हणते आहे. 'हे जन्म-मरणादिविकारांच्या अतीत असणाऱ्या आणि असंख्य ब्रह्मांडे आपल्या कुशींत धारण करणाऱ्या देवा! माझ्या कुशीतून जन्म घेण्याचे हे आपण लोकांना दाखविलेले एक नाटक मात्र आहे. ह्यामुळे आमची उभय कुळे पावन झाली आहेत.'४५.

**सत्यसङ्कल्प ते विघ्नं माऽस्तु रूपं स्थिरीकुरु । मयीदं चात्र भो स्थेयं यावत्पुत्रो भविष्यति ।।४६।।**
**तथेत्युक्त्वेशबुद्ध्याऽसौ स्थित्वा ताभ्यां सुपूजितः । तत्र शिक्षितवाञ्छिष्यान्विदुषोऽप्येष वेदवाक् ।।४७।।**
**अम्बापि गर्भिणी भूत्वा कालेऽसूत सुतौ शुभौ । स त्रैमासिकयोः शिश्वोः प्राहाम्बां शृणु मेऽम्ब भोः ।।४८।।**
**जातौ द्वौ ते भविष्यन्ति पुत्रौ पुत्री च सत्तमाः । देह्याज्ञां म इति प्रोक्त्वा तदाज्ञप्तः प्रचक्रमे ।।४९।।**

भो सत्यसङ्कल्प, ते विघ्नं मा अस्तु। मयि इदं रूपं स्थिरीकुरु। च यावत् पुत्रो भविष्यति अत्र स्थेयम्'।४६। तथा इत् उक्त्वा असौ तत्र स्थित्वा, ताभ्यां ईश+बुद्ध्या सुपूजितः, एष वेद+वाक् विदुषः अपि शिष्यान् शिक्षितवान्।४७। अम्बा अपि गर्भिणी भूत्वा काले शुभौ सुतौ असूत। शिश्वोः त्रै+मासिकयोः (सतोः) सः अम्बां प्राह। भोः मे अम्ब, शृणु।४८। (अधुना) ते द्वौ (पुत्रौ) जातौ। (परं) सत्तमाः पुत्रौ पुत्री च भविष्यन्ति। मे (गन्तुं) आज्ञां देही। इति प्रोक्त्वा तत्+आज्ञप्तः प्रचक्रमे।४९।

आपण आपला संकल्प खरा करणारे आहांत, आपल्या उपक्रमाला मी विघ्न करीत नाही. माझ्या चित्तांत हे आपले रूप स्थिर व्हावे तसेच आम्हांला पुत्र होईपर्यंत आपण इथेच राहावे अशी माझी प्रार्थना आहे.४६. मातेच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरु तिथे राहिले. त्यांच्या मातापित्यांनी त्यांचे ईश्वरबुद्धीने उत्तम प्रकारे पूजन केले. तसेच वेद हेच ज्याची वाणी आहेत अशा श्रीगुरूंजवळ अनेक विद्वान् शिष्यसुद्धां शिकूं लागले. पद, वाक्य, प्रमाणांनी उत्पन्न होणाऱ्या संशयरहित ज्ञानाचा त्यांना श्रीगुरूंनी उपदेश केला.४७. अम्बेनेही यथाकाल गर्भ धारण करून दोन छानशा मुलांना जन्म दिला. ती जुळी बाळे तीन महिन्यांची झाली असतां त्या श्रीगुरूंनी आईला बोलावून म्हटले, हे माझे आई, ऐक!४८. आतां तुला दोन पुत्र झाले आहेत. पुढे अगदी उत्तम असे आणखी दोन पुत्र आणि एक मुलगी तुला होतील. तरी आतां मला जाण्याची आज्ञा दे. असे बोलून आणि आणि मातेचा निरोप घेऊन श्रीगुरू घरांतून जायला निघाले.४९.

**रेजे शिरस्त्राणविशोभिमूर्धा सुपादुकामण्डितपादपद्मः ।**
**काषायवस्त्रावृतपेशलाङ्गः कौपीनधृग्दण्डकरः स्मितास्यः ।।५०।।**
**क्षमस्वार्भबुद्ध्या मयाजापराद्धमिति व्याहरन्तीं सतीं त्रिंशताब्दैः ।**
**पुनर्दर्शनं मेऽस्तु सांनिध्यमम्ब स्मृतावित्थमुक्त्वा ययौ तां निवर्त्य ।।५१।।**
**नायं मर्त्योऽस्तीश एनं नताः स्म एवं सद्भिः स्तूयमानो मुनीनः।**
**योगीशोऽपि द्राग्बदर्याश्रमं सद् द्रष्टुं काशीं प्राप वेषान्मुमुक्षोः ।।५२।।**

शिरः+त्राण+विशोभि+मूर्धा सुपादुका+मंडित+पाद+पद्मः काषाय+वस्त्र+आवृत+पेशल+अंगः कौपीन+धृक्+दण्ड+करः स्मित+आस्यः रेजे।५०। (हे) अज! मया अर्भ+बुद्ध्या अपराद्धं क्षमस्व! इति व्याहरन्तीं सतीं, (हे) अम्ब, त्रिंशत+अब्दैः मे पुन+दर्शनं अस्तु। स्मृतौ मे सान्निध्यं अस्तु। इत्थं उक्त्वा तां(तान्) निवर्त्य ययौ।५१। अयं मर्त्यः न (किंतु) ईशःअस्ति। एनं नताः स्म। एवं सद्भिः स्तूयमानः मुनीनः योगीशः अपि बदरि+आश्रमं द्रष्टुं मुमुक्षु+वेषेण काशीं प्राप।५२।

त्या वेळी जगदुद्धारासाठी घराबाहेर पडणाऱ्या त्या श्रीगुरूंच्या बालमूर्तीचे ध्यान या श्लोकांत दिले आहे. शिरस्त्राणाने मढवलेला चेहरा, छानशा पादुकांनी सजवलेली पदकमले, भगव्या वस्त्राने आच्छादलेली कोमल काया, कांसेला लंगोटी, चिमुकल्या हातांत दंड आणि स्मिताने विकसलेले तेजस्वी मुखकमल असे ते श्रीगुरू शोभत होते.५०. 'जन्मादि देहधर्मातीत परमेश्वरा! मी बालबुद्धीने (अजाणतेपणाने किंवा तुला सामान्य बालक समजून) जे अपराध केले आहेत - तुला अडवले, बांधले, खाण्यापिण्यांत हेळसांड केली, कडेवर घेतले नाही किंवा वेळींच धुतले-पुसले नाही, त्यांची मला क्षमा कर!' अशी काकळूत करणाऱ्या त्या साध्वीला, 'तीस वर्षांनी तुला पुन्हा भेटेन, तूं स्मरण करतांच तुझ्या चित्तांत प्रकटेन' असे आश्वासन देत तिला (आणि बरोबरच्या इतरही मंडळींना) निरवून श्रीगुरूंनी प्रयाण केले.५१. त्या वेळी सर्व साधुसज्जन म्हणूं लागले, 'हा बालक खरोखर मर्त्य मानव नाही तर साक्षात् ईश्वरच आहे. आपण ह्याला नमस्कार करूं या.' अशा प्रकारची वाखाणणी स्वीकारत, मुनिश्रेष्ठ योगीश्वर असूनही मुमुक्षूच्या वेषाने बदरिकाश्रमाच्या वाटेवर काशीला येऊन थांबले.५२.

**स खेचरत्सहृज्जिह्व उन्मन्यावस्थयाऽतपत् । तपः श्वासोछ्वासहीनः काश्यां वज्रासनस्थितः ।।५३।।**
**भागीरथ्यां त्रिषवणमथाप्लुत्य साष्टाङ्गयोगं युञ्जन्तं तं सकलमुनयः प्रेक्ष्य सिद्धासनस्थम् ।**
**नत्वाष्टाङ्गैः परतरधिया खेचरीमुद्रयैक-कुम्भोद्युक्तं जगुरुपरता नादसिद्धोत्समाधिम् ।।५४।।**

सः काश्यां वज्रासन+स्थितः खे+चरत्+स+हृत्+जिह्वः श्वास+उछ्वास+हीनः उन्मन्या अवस्थया तपः अतपत्।५३। भागीरथ्यां आप्लुत्य त्रिषवणं सिद्धासनस्थं स+अष्टांग+योगं युञ्जन्तं परतर+धिया खेचरी+मुद्रया एक+कुंभ+उद्युक्तं नाद+सिद्ध+उत्+समाधिं तं प्रेक्ष्य सकल+मुनयः उपरता परतर+धिया जगुः।५४।

काशीमध्ये वज्रासनावर (इथे त्याचा अर्थ सिद्धासन असा श्रीस्वामिमहाराजांनी केला आहे) जिह्वेसह मन आकाशांत नेणारी खेचरी मुद्रा धारण करून, श्वासोछ्वासरहित केवलकुंभक साधून, उन्मनी अवस्थेत खडतर तपाचे आचरण केले. तपानेच ब्रह्माला जाणावे या तैत्तरीय उपनिषदाच्या उक्तीचे (३:२) हे प्रात्यक्षिक लोकशिक्षणासाठी केले. श्रीगुरू नित्यमुक्त असल्याने त्यांना ह्या तपाचे कांहीच प्रयोजन नव्हते.५३. गंगेमध्ये त्रिकाल स्नान करून योगाच्या आठही अंगांचा अभ्यास करणाऱ्या, परमपदी बुद्धी स्थिरावणाऱ्या खेचरी (**खे** म्हणजे आकाश - सहस्रार चक्रांत जिह्वा आणि मन वि**चर**ते त्या) मुद्रेसहित, हठयोगप्रदीपिकेने सर्वश्रेष्ठ मानलेला (१:४५) केवलकुंभक साधून, अनाहतनादाच्या अनुसंधानाने सिद्ध झालेल्या उत्कृष्ट निर्विकल्प समाधीत निमग्न अशा त्या बालवयांतील श्रीगुरूंना पाहून काशीतील सर्व संन्यासी, 'हा परमेश्वरच आहे' अशा बुद्धीने त्यांच्या जवळ आदराने येऊन साष्टांग नमस्कार करून त्यांना म्हणाले.५४.

**भवान्परात्मास्ति न मर्त्यबालः सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारः ।**
**प्राक्शंकराचार्यमतोऽपि लुप्तः संन्यास एनं वितनोतु तिष्ये ।।५५।।**
**कष्टोत्थाद्यन्तवत्स्पर्श-भूभोगसुरतात्मभिः । उच्छिन्नोऽध्यात्मसौख्याज्ञैरयं कलिहतात्मभिः ।।५६।।**
**भीरूग्रे सुलभक्षेमे कलौ संन्यासवर्त्मना । अध्यात्मपरमानन्दं भगवन्दातुमर्हसि ।।५७।।**

भवान् मर्त्य+बालः न, (किन्तु) पर+आत्मा अस्ति। सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारः। प्राक् शंकराचार्य+मतः अपि संन्यासः तिष्ये लुप्तः। एनं (भवान्) तनोतु।५५। कष्ट+उत्थ+आदि+अन्त+वत्+भू+भोग+सुरत+आत्मभिः कलि+हत+आत्मभिः अध्यात्म+सौख्य+अज्ञैः अयं उच्छिन्नः।५६। (हे) भगवन्! भीरु उग्रे सुलभ+क्षेमे कलौ संन्यास+वर्त्मना अध्यात्म+परम+आनंदं दातुं अर्हसि।५७।

आपण सामान्य मानवी बालक नाहीत तर प्रत्यक्ष परमेश्वरच आहांत. साधूंच्या आणि धर्माच्या रक्षणासाठी आपण अवतार धारण केला आहे. पूर्वी शंकराचार्यांनी प्रतिष्ठित केलेला संन्यासमार्ग या कलिकाळांत सुप्तप्राय झाला आहे. त्याचा आपण प्रसार करावा. वास्तविक स्मृतिकारांनी अग्निहोत्र, यज्ञांत पशूचा बळी, संन्यास, श्राद्धांत मांसपाक, दीरापासून पुत्रोत्पत्ती या पांचांचा कलियुगांत निषेध असतांना संन्यासाच्या पुनःप्रतिष्ठेची प्रार्थना करण्याचे कारण असे आहे की स्मृतींनीच कलिकाळांतही जोंपर्यंत वेदांचे अध्ययन चालूं आहे, वर्णाश्रमधर्माचे आचरण करणारे लोक आहेत तोंवर अग्निहोत्र आणि संन्यास यांचा स्वीकार करण्याची आज्ञाही स्मृतींनी केलेली आहे.५५. स्वाभाविक अशा विषयसुखांत आसक्त असलेल्यांनी या कष्टकर संन्यासाचा आश्रय कां बरे करावा? तर तो मोक्षात लाभणाऱ्या नित्य, निरुपाधिक, निरतिशय सुखासाठी! असे जर आहे तर मग तो संन्यासमार्ग लोकांनी कां टाकून दिला? याचे उत्तर या श्लोकांत दिले आहे. खरे तर इंद्रियांच्या आणि विषयांच्या संयोगापासून उद्भवणाऱ्या भोगांना आदि आणि अंत असतात. ते भोग अनित्य असतात, क्षणभंगुर असतात. तसेच ते विषयपरतंत्र असतात. हवा असलेला विषय हवा तेव्हां मिळेलच असे नसते. त्या सुखांना सीमा असते. अशा या विषयोपभोगांत रमून गेलेल्या, कलीच्या प्रभावाने बुद्धी दूषित झालेल्या आणि म्हणूनच अध्यात्मांतील स्वतंत्र, निरंतर आणि असीम सुखाची जाणीवही नसलेल्या जनसामान्यांनी ह्या संन्यासमार्गाचा उच्छेद केला आहे.५६.

**इत्याश्रुत्योक्तमाचार्यं वृत्वा कृष्णसरस्वतीम् । ततः संन्यास्यभून्नाम्ना स नृसिंहसरस्वती ।।५८।।**
**न्यस्तसूत्रशिखो रेजे न्यस्तसर्वैषणो वशी । संन्यस्ताखिलसङ्कल्पः संन्यासी निर्ममोऽद्वयः ।।५९।।**
**संन्यासपद्धतिं प्राह मुमुक्षुभ्यो जगद्गुरुः । विरजोमाञ्छुचिर्देवीं प्रविष्टो हापितैषणः ।।६०।।**

इति (तैः) उक्तं आश्रुत्य, कृष्णसरस्वतीं आचार्यं वृत्वा ततः स नाम्ना नृसिंहसरस्वती संन्यासी अभूत्।५८। न्यस्त+सूत्र+शिखः न्यस्त+सर्व+एषणः वशी संन्यस्त+अखिल+संकल्पः निर्ममः अद्वयः संन्यासी रेजे।५९। (ततः) जगद्गुरुः मुमुक्षुभ्यः संन्या+पद्धतिं प्राह। शुचिः विरजोमान् देवीं प्रविष्ट त्यक्त+एषणः (संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्)।६०।

भगवंता! भित्र्यांना उग्र भासणाऱ्या, पण तरी मोक्षप्राप्ती ज्या युगांत सुगम आहे अशा या कलिकाळांत संन्यासाच्या मार्गाने अध्यात्माचे परमसुखाचे दान देण्यास आपणच समर्थ आहांत.५७. अशा त्यांच्या म्हणण्याला मान देऊन श्रीगुरूंनी कृष्णसरस्वतींना गुरू करून संन्यास घेतला आणि नृसिंहसरस्वती हे नांव धारण केले.५८. केवळ नावानेच नाही तर आचरणानेही ते संन्यासी झाले. संन्यासधर्माला अनुसरून शेंडी आणि जानवे तर त्यांनी त्यागलेच, पण त्याचबरोबर दारा (पुत्र), वित्त आणि लौकिक या तीनही एषणांचाही त्याग केला; समस्त संकल्पांचाही त्याग केला; विषयांच्या त्यागाने इंद्रियांवर ताबा मिळवला; ममता आणि सुख-दुःखादि द्वंद्वांचासुद्धां त्याग करून ते संन्यासधर्माला भूषणावह झाले. कठरुद्रोपनिषदाच्या (५) वचनानुसार यज्ञोपवीत आणि वैदिक कर्मादिकांचा त्याग करून परमहंसोपनिषदांत (२) ज्याला मुख्य संन्यासी म्हटले आहे असे ते परमहंस झाले.५९. त्यानंतर जगद्गुरू श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांनी मुमुक्षूंना संन्यासधर्माचे शिक्षण द्यायला आरंभ केला. 'कुत्र्याच्या वांतीप्रमाणे सर्व - ब्रह्मलोकापर्यंत ऐहिक आणि पारलौकिक मनापासून पूर्णपणे त्यागावे; शिखा तसेच यज्ञोपवीत काढून टाकावीत; प्रायश्चित्तांनी शुद्ध व्हावे; विरजा होम करावा; गायत्रीप्रवेश करावा आणि तीनही एषणांचा त्याग करावा.' परमहंसोपनिषदाच्या (२) वचनाला अनुसरून आपल्या शरीरभोगासाठी आणि लोकोपकारासाठी लंगोटी, दण्ड आणि छाटी यांचा परिग्रह करावा. हा दंडी या शब्दाचा भावार्थ आहे. वर सांगितलेल्या मुख्य संन्यासाहून वेगळा आहे. हा विविदिषा संन्यास आहे. विद्वत् संन्यास नव्हे. अशा रीतीने विविदिषा संन्यास घेऊन सद्गुरूंना शरण जावे.६०.

**संन्यस्तसकलोऽसूत्र-चूडो दण्डी गुरुं भजेत् । प्रज्ञानं ब्रह्मायमात्मा ब्रह्म तत्त्वमसीति च ।।६१।।**
**अहं ब्रह्मास्मीति महा-वाक्यान्याप्त्वार्थतो वशी । पञ्चीकरणविल्लब्ध-संज्ञः शौची स्वधर्मवित् ।।६२।।**
**दैवभावो योगपट्टी संन्यासी श्रेयसेऽर्हति । गतिज्ञो धारणाभ्यासाज्जीवन्मुच्येत्परात्मदृक् ।।६३।।**

(संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्।) 'प्रज्ञानं ब्रह्म', 'अयमात्मा ब्रह्म', 'तत्त्वमसि' इति अहं 'ब्रह्मास्मि' इति च महावाक्यानि अर्थतो आप्त्वा, पंचीकरण+वित् लब्ध+संज्ञः शौची स्वधर्म+वित् दैवभावो, योगपट्टधारी संन्यासी श्रेयसे अर्हति। गतिज्ञो धारणा+अभ्यासात् परात्म+दृक् जीवन् मुच्येत।६१-६३।

ऋग्वेदांतर्गत (ऐतरेय उ. ३:१:३) 'प्रज्ञानच ब्रह्म' (आहे), यजुर्वेदांतर्गत 'मी ब्रह्म आहे' (बृहदारण्यक उ.१:४:१०), सामवेदांतर्गत, 'ते तू आहेस', (छांदोग्य उ. ६:८:७) आणि अथर्ववेदांतर्गत 'हा आत्मा ब्रह्म (आहे)' (मांडूक्य उ. २) ही चार महावाक्ये सद्गुरूंकडून त्यांच्या अर्थासह श्रवण करावीत.

**प्रज्ञानं ब्रह्म :-** ऐतरेय उपनिषदांत प्रथम केवळ एक ब्रह्मच काय ते होते; दुसरे कांहीच नव्हते. त्या एकमेवाद्वितीय ब्रह्माने ईक्षणमात्रे चराचर सृष्टी केली. सर्व इंद्रिये निर्मिली. जीवांच्या दैनंदिन व्यवहारासाठी नेत्र, कण्ठ आणि हृदय या स्थानी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या अवस्था निर्मिल्या. देहांतराच्या व्यवहारासाठी पितृशरीर, मातृशरीर आणि स्वशरीर असा सर्व प्रपंच निर्माण करून त्यांत प्रवेश केला. ह्या अध्यारोपाचा अपवाद करण्यासाठी तो देहप्रविष्ट प्रत्यगात्मा ब्रह्मस्वरूपच आहे असे प्रतिपादन उपनिषदांत केले आहे. त्यानंतर आत्मज्ञानाचे मुख्य साधन जे वैराग्य त्याच्या उत्पत्तीसाठी *'पुरुषे ह वा'* (ऐतरेय उ. २:१:१) इत्यादींनी गर्भवासादि दुःखांचे वर्णन करून प्रज्ञारूपी आत्माच ब्रह्म आहे हे या वाक्याने प्रतिपादले आहे. विद्यारण्यस्वामींनी ह्या महावाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे.

**ब्रह्मीभूतस्य गव्यात्मा व्यसुः क्षेप्योऽप्क्रियादि नो । इत्युक्त्वा ग्राहयामास संन्यासं स्वधिकारिणः ।।६४।।**

ब्रह्मीभूतस्य व्यसुः आत्मा गवि क्षेप्यः। अप्+ क्रियादि नो। इति उक्त्वा सु+अधिकारिणः संन्यासं ग्राहयामास।६४।

*येनेक्षिते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादू विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितं ।*
*चतुर्मुखेन्द्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्म मय्यपि ।। पंचदशी ५:१-२*

ब्रह्मदेव, इंद्रादि देव तसेच मनुष्य, घोडे, गाई इत्यादीसुद्धां ज्या एका चैतन्याद्वारे ऐकतात, हुंगतात, व्यक्त करतात, गोड-अगोड अनुभवतात त्याला प्रज्ञान म्हणतात. तेच प्रज्ञान माझ्यांतही आहेच. तेच ब्रह्म होय.

**अहं ब्रह्मास्मि -** हे यजुर्वेदांतर्गत महावाक्य आहे.

*परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि । बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ।*
*स्वतःपूर्णः परात्मात्र ब्रह्माब्देन वर्णितः । अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म भवाम्यहं ।। पंचदशी ५:३-४*

अधिकारी साधकांच्या बुद्धीत साक्षित्वाने अहं म्हणून स्फुरणारे चैतन्य (जीवात्मा) हा 'मी' शब्दाचा अर्थ. सर्वव्यापी सच्चिदानंद स्वयंपूर्ण परमात्मा म्हणजेच 'ब्रह्म'. 'आहे' या शब्दाने दोहोंचे ऐक्य दाखविले आहे.

**तत्त्वमसि -** हे सामवेदांतर्गत वाक्य आहे.

*एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितं । सृष्टेः पुराधुनाऽप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ।*
*श्रोतुर्देहेन्द्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितं । एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयतां ।। पंचदशी ५:५-६*

**ततः प्रभृति संन्यासः संप्रवृत्तोऽमृतायनः । काश्यां पुमर्थवेदार्थान्प्रकाश्योत्तरवर्त्मना ।।६५।।**

ततः प्रभृति अमृतायनः संन्यासः संप्रवृत्त्ः। काश्यां पुं+अर्थ+वेद+अर्थान् प्रकाश्य उत्तर+वर्त्मना ।६५।

सृष्टीच्या पूर्वी आणि प्रलयाच्या नंतरही जसेच्या तसेच राहणाऱ्या, अविकारी, एकमेवाद्वितीय, सच्चिदानंद परमात्मस्वरूपाला 'ते' (तत्पदाने) म्हणून श्रवण करणाऱ्या शिष्याच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या पलीकडील चैतन्याचा 'तू' या शब्दाने (त्वंपदाने) निर्देश केला आहे. 'आहेस' (असिपदाने) शब्दाने हे दोन्हीचा अभेद प्रतिपादला आहे.६१.

**अयमात्मा ब्रह्म -** हे अथर्ववेदांतील महावाक्य आहे.

*स्वप्रकाशापरोक्षत्वमयमित्युक्तितो मतं । अहंकारादिदेहांतात्प्रत्यगात्मेति गीयते ।*
*दृश्यमानस्य सर्वस्य जगत्स्तत्त्वमीर्यते । ब्रह्माब्देन तद्ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम ।। पंचदशी ५:७-८*

आपल्या अंतरांत प्रकाशून प्रतीतीला येणारा अपरोक्ष 'हा' अहंकाराने स्थूल देहाला बांधल्यासारखा भासणारा 'आत्मा'च (प्रत्यगात्मा) अनुभवाला येणाऱ्या सर्व जगताचे मूलतत्त्व असलेले 'परोक्ष ब्रह्म' आहे असा याचा अर्थ आहे.

*सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः । ब्रह्मापरोक्षसिद्ध्यर्थं महावाक्यमितीरितम् ।*
*वाक्यवृत्तावतो ब्रह्मापरोक्ष्यविमतिर्न हि ।। पंचदशी ७:६९-७०*

ही महावाक्ये त्यांच्या अर्थासह जाणून पंचीकरणाचे ज्ञान प्राप्त करून संज्ञा म्हणजे संन्यासाश्रमांतील नांव (योगपट्ट) धारण करून, बाह्य आणि आंतरिक शौच (बाहेरी कर्मे क्षाळिला। अंतरीं ज्ञानें उजळिला।) संपादन करून आपल्या (संन्यास) धर्माचे पालन करणारा,६२. दैवी संपत्तीयुक्त योगपट्टधारी संन्याशालाच मोक्षाची योग्यता असते. उत्तरायण, शुक्ल पक्ष आणि दिवस या काळांच्या अभिमानी देवतांद्वारां गंवसणाऱ्या सूर्यकिरणानुसारी गतीचे ज्ञान असणारा हा संन्यासी ब्रह्मसूत्रांत सांगितल्याप्रमाणे (४:२:१८-२०) रात्री किंवा दक्षिणायनांतही मरण पावला तरी ब्रह्मलोकालाच जातो.

**मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मापि सुशिष्ययुक् । तीर्थस्नातो ययौ गङ्गा-सागरं भक्तगुप्तये ।।६६।।**

मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मा+अपि सुशिष्य+युक् तीर्थ+स्नातो भक्त+गुप्तये गंगा+सागरं ययौ।६५-६६।

अशा यतीला धारणेच्या अभ्यासाने जिवंत असतांनाच मुक्तीचा लाभ होतो. नाभी, हृदय, आज्ञाचक्र इत्यादि देशांवर चित्त एकाग्र करणे म्हणजे 'धारणा'. त्या धारणेचा नित्य अभ्यास करणारा यति, **पर** म्हणजे ब्रह्म आणि **आत्मा** म्हणजे प्रत्यगात्मा यांच्यांत अभेद दृष्टी ठेवून जिवंतपणीच अविद्या, काम आणि कर्म यांच्यापासून मुक्त होतो.६३. ब्रह्मीभूत झालेल्या गतप्राण यतीचा देह शक्य तर पाण्यांत सोडावा अथवा ते शक्य नसेल तर जमिनीत पुरावा. **गो** या शब्दाचे पाणी आणि भूमी असेही अर्थ होतात. गतप्राण हे मुंडकोपनिषदांत (३:२:७) वर्णन केलेल्या सर्व कलांच्या निर्गमनाचे उपलक्षण आहे. पंचदश कला आपल्या आधारभूत महाभूतांसह इंद्रियांच्या अधिष्ठानभूत देवतांत विलीन होतात. कर्म, बुद्धी आणि आत्मा हे सर्व परमात्मस्वरूपाशी एकत्व पावतात. छांदोग्य उपनिषदाच्या कथनानुसार (४:१५:५) अशा ज्ञानी पुरुषाच्या देहाचे दहन केले अथवा न केले तरी तो देवयान पंथाने ब्रह्मलोकाला जातो. त्यावर भाष्यकारांनी त्यांचे दहन करू नये असे स्पष्ट केले आहे. अप् म्हणजे जल. जलक्रिया या शब्दाने अंजली, पिंड, निर्वाप, एकोद्दिष्ट श्राद्ध, करण, मासिक श्राद्ध इत्यादि करूं नयेत. मुलगा असेल तर त्याने इतर पितरांसाठी आणि पुत्रत्वाचे कर्तव्य म्हणून पार्वण श्राद्ध करावे. असा हा संन्यासधर्म सर्वांना सांगून श्रीगुरू उत्तम अधिकारी शिष्यांनाच संन्यास देत असत. यावरून अनधिकारी शिष्याला दिलेला संन्यास त्याच्या पतनालाच कारण होतो हे लक्षांत ठेवावे.६४.

तेव्हांपासून मुक्तीचा मार्ग असा संन्यासाश्रम पुनःप्रतिष्ठित झाला. अशा रीतीने श्रीगुरूंनी कांही काळ काशीत चित्तांतील अंधःकार दूर करणाऱ्या वेदांच्या बोधाने योग्य शिष्यांना चारी पुरुषार्थ प्राप्त करविले. नंतर उत्तरेकडील मार्गाने मेरूला सव्य प्रदक्षिणा करून स्वतः पावित्र्याची मूर्ती असलेले श्रीगुरू भक्तांच्या रक्षणासाठी तीर्थांमध्ये स्नान करीत गंगासागराला येऊन पोचले.६५.

**कारयित्वा बहिःस्पर्शान्बाह्यान्सोऽन्ते दृशं भ्रुवोः । प्राणापानौ च खे तुल्यौ यतिभ्यो योगमादिशत् ।।६७।।**
**प्रयागेऽथैत्य संन्यासं माधवब्रह्मणे ददौ । विभुस्तत्त्वोपदेशं च निजोद्भवभुवं ययौ ।।६८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**यत्प्रसादान्नरा मुक्ता अद्वैतामृतवर्षिणः । भवन्त्यस्य किमाचार्यैः कोऽयं कृष्णसरस्वती ।।६९।।**

बहिः+स्पर्शान् बाह्यान् कृत्वा सः दृशः अन्ते भ्रुवोः (कारयित्वा), प्राण+अपानौ खे तुल्यौ (कारयित्वा) यतिभ्यः योगं आदिशत्।६७। अथ प्रयागे एत्य विभुः माधवब्रह्मणे संन्यासं तत्त्व+उपदेशं च ददौ। (ततः) निज+उद्भव+भुवं ययौ।६८। नामधारक उवाच। अद्वैत+अमृत+वर्षिणः यत्+प्रसादात् नरा मुक्ता भवन्ति अस्य किं आचार्यैः? अयं कृष्णसरस्वती कः?६९।

बाहेरच्या रूपरसादि विषयांचे चिंतन केल्याने ते चित्तांत प्रवेश करतात. त्यासाठी त्यांचे चिंतन सोडून त्यांना बाहेरच ठेवायचे. मग दृष्टी भुंवयांच्या मध्यावर स्थिर करायची. डोळे एकदमच मिटले तर चित्त झोपेत लीन होते आणि उघडे ठेवले तर ते चित्त बाहेरच्या विषयांकडे धांवतेय म्हणून अर्धोन्मीलित दृष्टीने भुंवयांच्या मध्यावर दृष्टी केंद्रित करून ती हृदयाकाशांत स्थिर करावी. नासिकेंतून प्रवाहित होणारे श्वास आणि उच्छ्वास मंद करून ते नासिकेंतच सम करायचे. अशा प्रकारच्या ह्या योगाचा अभ्यास यतींच्याकडून श्रीगुरूंनी करून घेतला.६७. त्यानंतर श्रीगुरूंनी प्रयाग क्षेत्री येऊन माधव नांवाच्या ब्राह्मणाला संन्यास दिला आणि त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. तेथून पुढे ते आपल्या जन्मभूमीला गेले.६८. यावर नामधारकाने प्रश्न केला की मोक्षरूपी अमृताची वृष्टी करणाऱ्या श्रीगुरूंच्या प्रसादाने मानवांना मुक्ती मिळते. त्यांना आचार्य करण्याचे काय प्रयोजन? शास्त्रार्थाचे आलोडन करून त्यांतील वेचक तत्त्वांचा इतरांनाही बोध करून देऊन त्यांच्याकडून ती आचारणात आणतात आणि स्वतःसुद्धां त्यांचे आचरण करून आदर्श उभा करतात त्यांना आचार्य म्हणतात. (*'आचिनोति हि शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि। स्वयं चाचरते यस्मात्तेनाचार्यः स उच्यते।।'*) आणि हे कृष्णसरस्वती कोण होते?६९.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सांदीपनिवसिष्ठाद्याः कृष्णरामादिभिर्वृताः । गुरवोऽपि तथाऽजेन वृतः कृष्णसरस्वती ।।७०।।**
**मानुष्यं लीलयासाद्य स तद्वद्वर्तते न चेत् । वर्तेत सङ्करो लोके भवेत्तदनुवर्तितः ।।७१।।**
**येनाध्यक्षेण मा सूते जगत्तेन न बद्ध्यते । असक्तोऽयमुदासीन-वत्स्थितः किमुतेतरैः ।।७२।।**
**शिष्यो विष्णुः पुरेशस्य विष्णोर्विधिरभूद्विधेः । वसिष्ठस्तस्य शाक्त्योऽस्य व्यासस्तस्य शुकोऽस्य तु ।।७३।।**
**गौडपादोऽस्य गोविन्दः शंकरस्तस्य तस्य तु । विश्वरूपस्तस्य बोध-ज्ञानः सिंहगिरिस्तथा ।।७४।।**
**तस्येश्वरो नृसिंहोऽस्य विद्यातीर्थं ततः शिवः । तस्य भागीरथीतीर्थं विद्यारण्योऽस्य तस्य तु ।।७५।।**
**शिष्योऽभून्मलयानन्दो देवतीर्थं सरस्वती । यादवेन्द्रोऽस्य तस्यायं शिष्यः कृष्णसरस्वती ।।७६।।**

सिद्ध उवाच। कृष्ण+रामदिभिः अपि सांदीपनि+वसिष्ठाद्याः गुरवः वृतः। तथा अजेन कृष्णसरस्वती वृतः।७०। लीलया मानुष्यं आसाद्य सः तत्+वत् वर्तते। न वर्तते चेत् तत्+अनु+वर्तितः लोके सङ्करो भवेत्।७१। येन अध्यक्षेण मा जगत् सूते तेन अयं न बद्ध्यते। अयं असक्तः उदासीनवत् स्थितः। इतरैः किं उत?।७२। पुर+ईशस्य विष्णुः शिष्यः। विष्णोः विधिः (शिष्यो) अभूत्। विधेः वसिष्ठः। तस्य शाक्त्यः। तस्य व्यासः। तस्य शुकः। अस्य (शुकस्य) तु गौडपादः। अस्य गोविन्दः। तस्य शंकरः। तस्य (शंकरस्य) तु विश्वरूपः। तस्य बोधज्ञानः। तथा (तस्मात्) सिंहगिरिः। तस्य ईश्वरः। अस्य नृसिंहः। (अस्य) विद्यातीर्थः। ततः शिवतीर्थः। तस्य भागीरथीतीर्थः, अस्य विद्यारण्यः। तस्य तु मलयानंदः शिष्यः अभूत्। (तस्य) देवतीर्थः। (तस्य) सरस्वतीयादवेन्द्रः। अस्य अयं शिष्यः कृष्णसरस्वती।७३-७६।

सिद्ध सांगतात की राम, कृष्ण इत्यादि पूर्वींच्या अवतारांनीही सांदीपनि, वसिष्ठ इत्यादि गुरू केले. त्याचप्रमाणे अविकारी श्रीगुरूंनीही कृष्णसरस्वतींना गुरू केले.७०. स्वच्छेने लीलेने त्याने (भगवंताने) मानवदेह धारण केला असला तरी त्याला अनुसरून ते मानवांना योग्य असेच आचरण करतात. तसे त्यांनी न केले तर अनुकरणशील लोकही विपरीत आचरण करतील आणि भगवंत संकराला कारण होतील.७१.

**सर्वे स्वदीक्षाङ्किताख्या जाताः कृष्णसरस्वती । पारंपर्योत्तमो ज्ञानी वृद्धोऽतोऽयं वृतोऽमुना ।।७७।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनं नामाष्टमोऽध्यायः ।।**

सर्वे स्वदीक्षित+अंकित+आख्याः जाताः। कृष्णसरस्वती पार्यंपर+उत्तमः ज्ञानी वृद्धः। अतः अयं अमुना वृतः।७७।

आतां कृष्णसरस्वतींची गुरुपरंपरा सांगत आहेत. भगवान शंकरांचे शिष्य विष्णू, विष्णूंचे शिष्य ब्रह्मदेव; ब्रह्मदेवांचे शिष्य वसिष्ठ ऋषी; त्यांचे शिष्य पराशर; पराशरांपासून व्यास; व्यासांचे शिष्य शुकाचार्य; शुकाचार्यांचे गौडपादाचार्य; त्याचे शिष्य गोविंदयति; हे भ.पू.पा. शंकराचार्यांचे गुरू; आदिशंकराचार्यांचे शिष्य विश्वरूपाचार्य; त्यांचे बोधज्ञान; त्यांचे शिष्य सिंहगिरी; त्यांच्यापासून नृसिंह; मग विद्यातीर्थ, त्यांचे शिष्य शिवतीर्थ, त्यांचे भागीरथीतीर्थ; हे विद्यारण्यस्वामींचे गुरू; त्यांचे शिष्य मलयानंद; त्यांच्यानंतर देवतीर्थ; त्यांपासून सरस्वतीयादवेन्द्र; यांचेच शिष्य कृष्णसरस्वती होत.७३-७६. सर्वांचे योगपट्ट त्यांच्या त्यांच्या दीक्षेनुसार झाले. तीर्थ, आश्रम इत्यादि उपपदे उपदेश, दंडदानादींची दीक्षा ज्या गुरुस्वामींकडून घेतली त्याची असतात. इथे दिलेला परंपराक्रम हा ज्ञानोपदेशाचा आहे. त्यामुळे उपपदाची भिन्नता दिसून येते. हे कृष्णसरस्वती अशा उत्तम परंपरेचे ज्ञानी असल्याने तसेच वृद्ध असल्याने त्यांना श्रीगुरूंनी आचार्य केले.७७.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा आठवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# नवमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। नवव्या अध्यायी जन्मभूमी पाहुनी। श्रीगुरु विप्राचा पोटशूल वारुनी।**
**सायंदेवाचे यवनभय हरुनी। तीर्थयात्रा वर्णिती।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भगवानपि संन्यासं प्रगृह्य स्वजनुस्थलम् । कुतो यातोऽस्य शिष्याः स्युः के के किमकरोत्ततः ।।१।।**

नामधारक उवाच। भग+वान् अपि संन्यासं प्रगृह्य स्व+जनु+स्थलम् कुतो यातः? अस्य शिष्याः के के स्युः? ततः (श्रीगुरुः) किं अकरोत्?१।

मागच्या अध्यायांत सिद्धमुनींनी श्रीगुरूंनी संन्यासाश्रम स्वीकारल्याचे वर्णन केले; आणि अध्यायाच्या शेवटी आपल्या जन्मभूमीला गेले असे सांगितले. तेव्हां नामधारकाला ते संन्यासाश्रमाला योग्य नाही असे वाटून त्याने प्रश्न केला आहे.

सर्व ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, औदार्य आदींनी संपन्न असलेल्या ('ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां **भग** इतीङ्गना।।') **भगवान्** श्रीगुरूंनी संन्यास घेऊनही ते आपल्या जन्मस्थळी कां गेले? त्यांचे शिष्य कोण कोण झाले? जन्मभूमीला जाऊन पुढे त्यांनी काय केले?१.

## ।। सिद्ध उवाच ।।

**महीं प्रदक्षिणीकृत्य प्रतिज्ञातानुसार्यजः । मातरं द्रष्टुमाप्तो हि माता वन्द्या यतेरपि ।।२।।**
**शिष्या हि बहवो जाता बालः कृष्ण उपेन्द्रकः । ज्ञानज्योतिः सदानन्दो माधवोऽहं च सप्तमः ।।३।।**
**सरस्वत्यन्तसंज्ञाः स्युरेते मुख्यास्तु भूरिशः । आसन्नन्ये स तैः साकमाययौ स्वजनुस्थलम् ।।४।।**

सिद्ध उवाच। महीं प्रदक्षिणी+कृत्य प्रतिज्ञात+अनुसारी अजः मातरं द्रष्टुं आप्तः। हि यतेः अपि माता वन्द्या।२। शिष्या हि बहवः जाताः। बालः, कृष्णः, उपेन्द्रः, ज्ञानज्योतिः, सदानंदः माधवः, अहं च सप्तमः।३। एते सरस्वति+अंत्य+संज्ञाः मुख्याः स्युः। अन्ये तु भूरिशः आसन्। सः तैः साकं स्वजनु+स्थलं आययौ।४।

तीस वर्षांनी पुन्हां माझे दर्शन होईल, असे आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी आणि माता संन्याशालाही वंदनीय असल्याने तिच्या दर्शनासाठी भगवान आले असे उत्तर देतांना सिद्ध म्हणतात पृथ्वीला (मेरु पर्वताला) उजव्या बाजूने परिक्रमा (प्र+दक्षिणं) करून **अजन्मा** श्रीगुरू (इथे अजन्मा शब्दांतून ते मर्त्य नसून केवळ माणूसपणाचे नाटक करीत असल्याचे सुचविले आहे) आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी संन्याशालाही वंद्य अशा मातेच्या दर्शनाला आले. श्रुतीच्या आज्ञेप्रमाणे (जाणत्याने सत्यच बोलावे; खोटे बोलणाऱ्याचा समूळ परिशोष होतो. प्रश्न उ. ६:१) आपल्या वचनाच्या पूर्तीसाठी श्रीगुरू कारंजाला आले. नामधारकाच्या पहिल्या प्रश्नाचे हे उत्तर आहे.२.

कोण कोण शिष्य झाले या प्रश्नाचे उत्तर पुढच्या श्लोकांत देत आहेत. आपल्या ज्येष्ठ पुत्राचे आयुष्य वाढावे अशा हेतूने जसे संसारी लोक त्याच्या नांवाचा उच्चार न करतां त्याला बाळ अशा नांवाने हांक मारतात त्याचप्रमाणे भगवंतांनीही आपल्या पुत्रवत् पहिल्या आणि निकटवर्ती शिष्याचे नांव बालसरस्वती असे ठेवले.

**पितरौ प्रेक्ष्य बन्धूंश्च भगिनीमितरानपि । तत्राददे विश्वरूपः पूजां प्रत्यालयं क्षणात् ।।५।।**

पितरौ, बंधून्, भगिनीं च, इतरान् अपि प्रेक्ष्य तत्र विश्वरूपः क्षणात् प्रति+आलयं पूजां आददे।५।

कारण शिष्यसुद्धां पुत्राप्रमाणेच गौणात्मा मानला आहे. व्यावहारिक पितासुद्धां संन्यास घेतांना किंवा मृत्यूच्या समयी पुत्राला 'तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस' असे अनुशासन करतो आणि त्यानुसार पुत्रही 'मी ब्रह्म आहे, यज्ञ आहे, लोक आहे' असे म्हणतो (बृहदारण्यकोपनिषत् १:५:१७). त्याचा भाव असा - तुम्ही शिकविलेल्या ब्रह्माचे म्हणजे वेदांचे मी अध्ययन आणि अध्यापन करीन, तुम्ही अनुष्ठिलेल्या यज्ञांचे मी अनुष्ठान करीन आणि तुम्ही संपादिलेले स्वर्गादि लोक मीही प्राप्त करीन. याच अर्थाने एतरेय उपनिषदांत (२:४) पुत्राला पुण्यकर्मांत प्रतिनिधित्व करणारा आत्मा असे म्हटले आहे. परमार्थमार्गांतही परम्परा अखंड चालण्यासाठी गुरू आपल्या शिष्याला प्रतिनिधित्व देतो. वेदांनीही शिष्यप्रशिष्य इत्यादि परंपरेला कुल अशीच संज्ञा दिली आहे. मुंडक (३:२:९) आणि मांडूक्य (१०) उपनिषदांत ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या कुळांत ब्रह्म न जाणणारा होत नाही असे म्हटले आहे त्याचा अभिप्राय गुरुकुल असाच आहे. बालसरस्वतीनंतर कृष्ण, उपेन्द्र, ज्ञानज्योती, सदानंद, माधव आणि सातवा स्वतः सिद्ध अशी मुख्य शिष्यांची नांवे सांगितली आहेत.३. सिद्ध पुढे म्हणतात परमगुरू कृष्णसरस्वतींनी दक्षिणमठ संप्रदायाला अनुसरून श्रीगुरूंना नरसिंहसरस्वती असा योगपट्ट दिला तसाच आम्हां सर्व शिष्यांच्याही नांवांच्या शेवटी सरस्वती हे उपनाम दिले. त्यांतील वरील सात जण मुख्य होत. त्याशिवायही अनेक इतर शिष्य होते. त्या सर्वांच्या सह श्रीगुरू आपल्या मातृभूमीला - कारंजाला आले.४. आई-वडील, बंधू, बहीण तसेच इतरही पूर्वाश्रमाचे संबंधी लोक यांना भेटून त्या कारंजा गांवी श्रीगुरूंनी एका वेळी अनेक रूपे धारण करून घरोघरी जाऊन सर्वांची पूजा स्वीकारली.५.

**पित्रार्चितममुं दृष्ट्वा प्राक्स्मृत्याऽम्बाब्रवीत्प्रिय । मृत्यून्मुखीं कुपुत्रां मां योऽरक्षच्छ्रीपदस्त्वयम् ।।६।।**
**मादृग्भवेत्सुत इति प्रतिज्ञातसुसिद्धये । स्वदृगन्यसुताभावात्स्वयमेवाभवत्सुतः ।।७।।**
**श्रीपाद मे त्वं न सुतोऽसि देव भवार्णवादुद्धर मा हरेऽज ।**
**लोकानुसारी खलु वर्तसे चेत् सम्बन्धमेनं स्मर पुत्र मातुः ।।८।।**
**कालदैवक्रियेशात्म-द्रव्याङ्गास्वात्मवैकृताः । तत्संघातः प्रवाहोऽसौ त्वन्मायैतां निवारय ।।९।।**

अमुं पित्रा अर्चितं दृष्ट्वा प्राक् स्मृत्या अम्बा अब्रवीत्, (हे) प्रिय, मां मृत्यु+उन्मुखीं कुपुत्रां यः अरक्षत् अयं तु श्रीपादः।६। मादृक् सुत भवेत इति प्रतिज्ञात+सु+सिद्धये स्व+दृक् अन्य+सुत+अभावात् स्वयम् एव सुतः अभवत्।७। (हे) देव, श्रीपाद, त्वं मे सुतः न असि। (हे) हरे, मां भव+अर्णवात् उद्धर। खलु लोक+अनुसारी वर्तसे चेत् (हे) पुत्र एनं मातुः सम्बंधं स्मर।८। काल+दैव+क्रिया+ईश+आत्म+द्रव्य+अङ्ग+असु+आत्म+वैकृताः तत् संघातः प्रवाहः असौ त्वत्+माया एतां निवारय।९।

त्या श्रीगुरूंची पूजा पिताजी माधव करीत असतांना अम्बामातेची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि ती आपल्या पतीला म्हणाली, 'प्राणनाथा, पूर्वजन्मी कुपुत्राच्या दुःखाने जीव द्यायला निघालेल्या मला वांचवणारा हाच श्रीपाद आहे.६. माझ्यासारखा पुत्र तुला होईल असा मला दिलेला वर तंतोतंत खरा करण्यासाठी, आपल्यासारखा त्रैलोक्यांत दुसरा कोणीच पुत्र न दिसल्यामुळे तो श्रीपादच आपल्या पोटी आला आहे!'७. 'हे श्रीपाद भगवंता, तूं माझा मुलगा नाहीस, साक्षात् हरी आहेस. मला या संसारसागरांतून तार! आणि तूं लोकव्यवहारानुसारच वागणार असशील तर पुत्रा, ह्या आईचे नाते ध्यानांत ठेव! पुं नांवाच्या नरकापासून सोडवणारा तोच पुत्र म्हणवतो ना?'८. '१ **काळ** हा क्षोभक, २ **कर्म** (क्रिया) हे निमित्त, ३ त्यांतला फलाभिमुख झालेला अंश म्हणजे **दैव** किंवा प्रारब्ध, ४ **ईश** म्हणजे जीव, ५ **आत्मा** म्हणजे कर्माच्या संस्कारापासून घडलेला त्याचा स्वभाव, ६ **द्रव्य** म्हणजे पंच तन्मात्रा (पांच महाभूतांचे सूक्ष्म अंश), ७ **अंग** म्हणजे त्यांनी घडलेला देह, ८ **असु** म्हणजे सूत्ररूप प्राण, ९ **आत्मा** म्हणजे अहंकार आणि १० **वैकृत** म्हणजे ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, मन आणि ५ महाभूते हे सोळा पदार्थ, या सर्वांचा संघात असलेल्या

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**संन्यासी यत्कुले जातस्तरत्यपि तरिष्यति । कुलैकविंशतिः पित्रोर्दुर्गताप्यमृतं लभेत् ।।१०।।**
**जातोऽत्रायं हि संन्यासी भो मातस्तेऽथ किं वद । सम्पत्प्रजान्वितानां वः काश्यां मुक्तिर्भविष्यति ।।११।।**

**।। भगिन्युवाच ।।**

**गतिर्मे काग्रतः स्वामिन्भवसिन्धोर्बिभेम्यहम् । पापिष्ठां मोद्धर हरे सद्गुरुस्त्वं हि मे प्रभो ।।१२।।**

श्रीगुरुः उवाच। 'यत्+कुले संन्यासी जातः (तत् कुलं) तरति अपि पित्रोः (भव्या) कुल+एकविंशतिः तरिष्यति। दुर्गतां अमृतं लभते'।१०। 'अत्र अयं हि संन्यासी जातः। भो मातः अथ ते किं वद्। सम्पत्+प्रजा+अन्वितानां वः काश्यां मुक्तिः भविष्यति'।११। भगिनी उवाच। '(हे) स्वामिन्, मे अग्रतः का गतिः? अहं भव+सिन्धोः बिभेमि। (हे) हरे, पापिष्ठां मां उद्धर। (हे) प्रभो त्वं हि मे सद्गुरुः'।१२।

लिंगदेहाचा जन्ममरणरूपी प्रवाह (देहरूपी बीजापासून कर्म आणि त्या कर्मापासूनच पुन्हा अंकुरणारा देह), ही सगळी देवा, तुझीच माया आहे. ही मिथ्या असली तरी आम्हांला तिचा पार सांपडत नाही. तूंच आम्हांला हिच्यापासून सोडव.'९.

श्रीगुरु म्हणाले, 'ज्या कुळांतील कुणी पुरुष संन्यासी होतो ते कुळ तर तरतेच पण माता आणि पिता या दोन्हीच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. कुणी नरकांतही गेले असले तर त्यांना मोक्ष मिळतो.' इथे मोक्ष म्हणजे आत्यंतिक मोक्ष नसून सापेक्ष - उच्चलोकप्राप्तीरूप मोक्ष समजावा.१०. 'तुमच्या ह्या कुळांत तर हा - साक्षात् परमात्मस्वरूप मी संन्यासी झालो आहे. हे माते, आतां तुझे आणखी काय करायचे राहिले आहे? संतती आणि संपत्ती यांनी समृद्ध असे तुम्ही उभयतां काशीक्षेत्री मुक्ती पावाल!'११. श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई त्यांना विनवीत आहे. 'महाराज, माझी यापुढे काय गती होईल? या संसारसमुद्राची मला भीती वाटते. आपणच माझे सद्गुरू आहांत. तरी माझा पापिणीचा आपण उद्धार करावा!'१२.

|| श्रीगुरुरुवाच ||

**पतिसेवनमेवैकं तारकं नापरं स्त्रियाः । पातिव्रत्यं भज ततो भवाब्धेः पारमेष्यसि ।।१३।।**
**दम्पत्योः प्राक्कृतं वैरं त्वया गौर्लत्तया हतः । अतः पत्युर्यतित्वं ते कुष्ठं चाङ्गे भविष्यतः ।।१४।।**
**इति श्रुत्वातिखिन्नाभूत्तामाश्वास्याह सद्गुरुः । वार्धक्ये तूभयं तेऽस्तु नश्येन्मे दर्शनात्कुरुक् ।।१५।।**
**इत्युक्त्वा तदनुज्ञातः सशिष्यो गौतमीं ययौ । याऽऽनीता गौतमेनेशाद् गोहत्याव्यपनुत्तये ।।१६।।**

श्रीगुरुः उवाच। 'स्त्रियाः पति+सेवनं एव एकं तारक्। न अपरम्। पातिव्रत्यं भज। ततः भव+अब्धेः पारं एष्यसि।१३। इति श्रुत्वा (सा) अति खिन्ना अभूत्। सद्गुरुः ताम् आश्वास्य आह। 'उभयं तु ते वार्धक्ये अस्तु। मे दर्शनात् कुरुक् नश्येत्।१४। प्राक् त्वया दम्पत्योः वैरं कृतम्। (तथा च) गौः लत्तया हता। अतः ते पत्युः यतित्वं च ते अङ्गे कुष्ठत्वं भविष्यतः'।१५। इति उक्त्वा (श्रीगुरुः) तत्+अनुज्ञातः सशिष्यः गौतमीं ययौ। या गौतमेन गो+हत्या+व्यपनुत्तये ईशात् आनीता।१६।

श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतीची सेवा हाच एक तरणोपाय आहे. अन्य कोणताही नाही. तरी तूं पातिव्रत्यधर्माचे पालन कर. त्याच्याच योगाने तू हा भवसागर पार करशील.'१३. हे ऐकून रत्नाबाई घाबरून व्याकुळ झाली. 'तेव्हां तिची समजूत घालीत सद्गुरू म्हणाले, 'ह्या दोन्ही गोष्टी तुझ्या उतारवयांत होतील. तसेच तुझा कुष्ठरोग माझ्या केवळ दर्शनानेच नाश पावेल.१४. पूर्वजन्मी तू पतिपत्नीत भांडण लावलेस आणि गोमातेला लाथ मारलीस. त्या योगे तुझा नवरा संन्यास घेऊन जाईल आणि तुझ्या शरीराला कुष्ठरोग होईल.'१५. असे बोलून श्रीगुरूंनी आपली भगिनी, बंधुवर्ग, माता, पिता आणि इतर कारंजवासीय संबंधितांचा निरोप घेतला; आणि शिष्यवर्गांसह ते दक्षिण दिशेला गोदावरीला गेले, ज्या नदीला गौतम ऋषींनी आपल्या तपोबलाने भगवान् शंकरांना प्रसन्न करून स्वर्गांतून सह्याद्रि पर्वतावर आणले. त्याची कथा कूर्मपुराणांत सविस्तर आहे.

**तामेत्याप्लुत्य भगवान्मुनिं माधवसंज्ञकम् । भक्तं गतानुगतान्मुक्त्वा स्तुतस्तेनाग्रतोऽगमत् ।।१७।।**
**सशिष्योऽग्रे व्रजन्दृष्ट्वा गङ्गायां मर्तुमुत्सुकम् । विप्रं गलशिलं कश्चिदादिष्टैस्तं कृपानिधिः ।।१८।।**
**छात्रैरुद्धारितं दीनं शूलरोगाकुलं प्रभुः । दयनीयतमं प्राह विधत्से साहसं कुतः ।।१९।।**

तां एत्य आप्लुत्य भगवान् माधवसंज्ञकं मुनिं गत+आगतात् मुक्त्वा तेन स्तुतः अग्रतो अगमत्।१७। सशिष्यः अग्रे व्रजन् गङ्गायां मर्तुं उत्सुकं कश्चित् गलशिलं विप्रं दृष्ट्वा आदिष्टैः छात्रैः उद्धारितं दीनं शूलरोग+आकुलं दयनीयतमं कृपानिधिः प्रभुः प्राह, 'साहसं कुतः विधत्से?'१८-१९।

थोडक्यांत, ऋषींनी आपल्या स्वार्थासाठी मायेने दर्भापासून निर्माण केलेल्या गाईला गौतमांच्या साळी खाण्यासाठी प्रेरित केले. आपल्या साळींची राखण करण्यासाठी गौतमांनी तिचे निवारण केले तेव्हां त्यांच्या केवळ करस्पर्शानेच ती मायावी गाय मरण पावली. तेव्हां सर्व ऋषींनी मिळून गौतमांना ह्या गोहत्येच्या पातकापासून मुक्त होण्यासाठी स्वर्गांतून गंगा पृथ्वीवर आणण्याचे प्रायश्चित्त सांगितले. १६. त्या गोदावरी नदीवर येऊन त्यांनी स्नान केले. तिथे असलेल्या माधव नांवाच्या एका तपस्वी मुनीला त्यांनी आपल्या उपदेशाने जन्ममरणरूपी संसारांतून मुक्त केले. नंतर त्याने केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून ते पुढे निघाले.१७. शिष्यांसह गोदावरीतीराने पुढे गेल्यावर त्यांना गळ्यांत धोंडा बांधून आत्महत्येला उद्युक्त झालेला कुणी एक ब्राह्मण दिसला. आपल्या शिष्यांना सांगून दयासागर प्रभूंनी त्या पोटशूळाने तडफडणाऱ्या दीनवाण्या ब्राह्मणाला कां असे साहस करीत आहेस? असे विचारले.१८. तो ब्राह्मण उत्तरला, मला हे विचारून काय उपयोग? माझा दुःखनाश तुम्ही कराल काय? अन्नाचा वैरी असलेला हा पोटशूळ नांवाचा विकार आतां अगदी सोसवत नाही. मी कसा जगूं? या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांनी या विकाराची योगरत्नाकरांत दिलेलली लक्षणे उद्धृत केली आहेत.

**।। विप्र उवाच ।।**

**किं करिष्यसि मां पृष्ट्वा मरिष्ये शूलकातरः । कथं जीवामि रोगोऽन्न-वैर्ययं दुःसहः सदा ।।२०।।**
**प्राणोऽन्नं जीवनं चान्नं लयोऽन्नं जीवमन्नमुत् । उद्भवोऽन्नं कथं स्थेयमृतेऽन्नात्तन्मृतिर्वरम् ।।२१।।**

विप्र उवाच। मां पृष्ट्वा किम् करिष्यसि? शूलकातरः मरिष्ये। अन्न+वैरी अयं रोगः सदा दुःसहः। कथं जीवामि?२०। किं 'अन्नं प्राणः जीवनं च। अन्नं लयः। अन्नं जीवम्। अन्नं उद्भवः। अन्नात् ऋते कथं स्थेयम्? तत् मृतिः वरम्!२१।

कुशींत, जठराच्या पाठीमागे, स्तनांजवळ, पाठीच्या खालच्या भागांत यापैकीं एक वा अनेक भागांत हा शूल उत्पन्न होतो. थोडे कांही खाल्ल्याने, उलटी झाल्याने किंवा अन्नाचे पचन झाल्यावर हा शूळ शांत होतो. षाष्टिक, साळी, तांदूळ यांच्या सेवनाने हा शूल वाढतो. त्यांच्या परिणामाने उद्भवणारा हा शूल ही जाणण्याला कठिणतम अशी महाव्याधि आहे. (*'बलासः प्रच्युतस्थानात्पित्तेन सह मूर्छितः।। वायुमादाय कुरुते शूलं जीर्यति भोजने।। कुक्षौ जठरपार्श्वेषु नाभौ बस्तौ स्तनान्तरे।। पृष्ठमूलप्रदेशेषु सर्वेष्वेतेषु वा पुनः।। भुक्तमात्रेऽथवा वान्ते जीर्णान्ने च प्रशाम्यते।। षाष्टिकव्रीहिशालीनामोदनेन विवर्धते।। तत्परिणामजं शूलं दुर्विज्ञेयं महागदम्'*) १९.

स्वस्थानापासून भ्रष्ट झालेला कफ पित्ताशी संयुक्त होऊन वायूच्या साह्याने शूल निर्माण करतो. हा शूल भोजनाने कमी होतो.'अन्नगत प्राण असल्याने अन्न हेच जीवन आहे. झोपही अन्नानेच येते. औषधरूपाने जगवणारेही अन्नच आहे. वीर्यरूपाने परिणत होऊन अन्नच जन्माला कारण होते. अन्नाशिवाय कसे राहतां येईल? त्यापेक्षां मला मरणच बरे वाटते.२१. 'मी पूर्वजन्मी किंवा याच जन्मी न भुकेल्याला अन्न दिले न कांही पुण्य केले. तसेच मी कांही पुण्यकर्मही केले नाही. आईवडील, गुरू इत्यदिकांची निन्दा केली असावी.२२.

**भवान्तरेऽत्र वा नान्नं दत्तं पुण्यं न वा कृतम् । गोविप्रग्रासोऽपहृतो निन्दिताः पितरौ गुरुः ।।२२।।**
**नेशोऽर्चितो वातिथयो हापिता धिक्कृता द्विजाः । मिष्टान्नं पितरौ त्यक्त्वा साकं भुक्तं स्त्रिया मया ।।२३।।**
**इति भात्यन्यथा नेदृक्कष्टं भो मय्युपस्थितम् । कृतो नान्योपकारो भूभारो मोघभवोऽभवम् ।।२४।।**
**मा भीर्दास्येऽन्नपथ्यं ते दिव्यौषधमहं भिषक् । इत्युक्त्वा विरते तस्मिन्द्विज एकः समाययौ ।।२५।।**
**सायंदेवाभिधः काञ्ची-वासी कौंडिण्यगोत्रजः । सुदीनो यवनाधीनस्तमाह प्रणतं गुरुः ।।२६।।**

(मया) भव+अंतरे अत्र वा अन्नं न दत्तं न वा पुण्यं कृतम्। (वा) गो+विप्र+ग्रासः अपहृतः। पितरौ, गुरुः (वा) निन्दिताः।२२। ईशः न अर्चितः वा अतिथयः हापिताः (वा) द्विजाः धिक्कृताः। मया पितरौ त्यक्त्वा स्त्रिया साकं मिष्टान्नं भुक्तम्।२३। इति भाति। भोः (गुरो) अन्यथा ईदृक् कष्टं मयि न उपस्थितम्। (मया) अन्य+उपकारः न कृतः। (तस्मात् अहं) भू+भारः मोघभवः अभवम्।'२४। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अहं भिषक्। ते अन्नपथ्यं दिव्य+औषधं दास्ये।' इति उक्त्वा तस्मिन् (श्रीगुरौ) विरते एकः द्विजः समाययौ।२५। सायंदेव+अभिधः काञ्ची+वासी कौण्डिण्य+गोत्रजः यवन+अधीनः सुदीनः। तं प्रणतं गुरुः प्राह।२६।

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

ईश्वराचे पूजनसुद्धां केले नाही; (माध्यान्हकाळी) अतिथीला हांकलले असावे; ब्राह्मणांचा अपमान केला असावा. आईवडिलांना सोडून मी बायकोबरोबर मिष्टान्न खाल्ले असावे.२३. अहो, असे नसते तर मला हे दुर्धर दुःसह कष्ट झालेच नसते. कसलाही परोपकार न केल्याने मी भूमीला भारभूत झालो आहे. हा माझा जन्म व्यर्थ आहे.'२४. श्रीगुरु त्याला म्हणाले, 'भिऊं नकोस! मी वैद्य आहे. तुला अन्न पचावे असे दिव्य औषध मी तुला देतो. असे श्रीगुरू बोलतात तोच त्यांच्याकडे एक ब्राह्मण आला.२५. सायंदेव नांवाचा तो कौण्डिण्य गोत्रीय ब्राह्मण उत्तरकांची(कडगंची)चा राहणारा होता आणि म्लेच्छाची चाकरी करीत होता. त्या विनम्र ब्राह्मणाने श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां त्याला श्रीगुरू म्हणाले.२६.

**मर्तुमिच्छति रुग्णोऽयं व्यथितो दिव्यमौषधम् । ददम्यस्मै त्वमपि ब्रह्मन्पथ्यं स्वाद्वन्नमर्पय ।।२७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**मासा पक्षेण वाल्पान्नं भुङ्क्त आत्यन्तिकीं व्यथाम् । स तदाप्नोत्यन्नदानाद् भवेद्धत्येति भाति मे ।।२८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भिषक्तमोऽस्मि नाशङ्क्यं सापूपं देहि माषयुक् । परमान्नं च पथ्यं मा भीर्जाने रुक्प्रतिक्रियाम् ।।२९।।**

अयं रुग्णः व्यथितः मर्तुम् इच्छति। तस्मै दिव्यं औषधं दद्मि। '(हे) ब्रह्मन्, त्वं अपि पथ्यं स्वादु अन्नं अर्पय।'२७। सायंदेवः उवाच। सः मासा पक्षेण वा अल्प+अन्नं भुङ्क्ते। तदा आत्यन्तिकीं व्यथां आप्नोति। अन्न+दानात् हत्या भवेत् इति मे भाति'।२८। श्रीगुरुः उवाच। 'भिषक्+तमः अस्मि। न आशंक्य स+अपूपं माषयुक् पथ्यं परमान्नं च देहि। मा भीः, रुक्+प्रतिक्रियां जाने।'२९।

'हा रोगी अत्यंत त्रासून मरायला निघाला आहे. मी ह्याला दिव्य औषध देतो आहे. तूंसुद्धां त्याला पथ्यकर गोड अन्न दे.'२७. सायंदेव उत्तरला, 'ह्याने महिन्या-पंधरवड्याला कधी तरी थोडेसेही अन्न खाल्ले तरी त्याला भयंकर वेदना होतात. मी अन्न दिले तर न जाणो, ह्याला कांही झाले तर मला ब्रह्महत्येचे पाप लागेल अशी मला भीती वाटते.'२८. श्रीगुरू म्हणाले, 'मी उत्तम वैद्य आहे. ईश्वरस्वरूप असल्याने श्रीगुरूंनी स्वतःला **भिषक्तम** (ऋग्वेद २:३३:४) म्हणणे योग्यच होय. मनांत कांहीही शंका न आणतां अपूप, उडदाचे वडे, पायस इत्यादींसह चारी ठाव भोजन ह्याला दे. घाबरूं नकोस, मी रोगाचा प्रतिकार उत्तम प्रकारे जाणतो.'२९. सायंदेवाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार करायचे मान्य केले आणि तो त्यांना म्हणाला, 'आपणही आपल्या शिष्यांसह माझ्या घरी येऊन भिक्षेचा स्वीकार करावा. मी आपला शिष्य होत आहे. तरी हे सद्गुरो, मी आपल्याला शरण आलो आहे, आपण मला मार्गदर्शन करा.'३०.

**।। सायंदेव उवाच ।।**

**तथा कुर्यामपि भवान्सशिष्योऽङ्गीकरोतु मे । भिक्षां गृहेऽस्मि ते शिष्यः प्रपन्नं शाधि मां गुरो ।।३०।।**
**इत्युक्तिं सौष्ठवौदार्य-रम्यां श्रुत्वा तथेति तम् । ऊचे ततः सशिष्यं तं द्विजो निन्ये निजालयम् ।।३१।।**
**चित्रितेऽलङ्कृते गेहे रंगवल्ल्यादि रञ्जिते । स्वासनेषूपवेश्यैतानुपतस्थेऽङ्गनान्वितः ।।३२।।**

सायंदेव उवाच। 'तथा कुर्याम्। सशिष्यः भवान् अपि मे गृहे भिक्षां अङ्गीकरोतु। ते शिष्यः अस्मि। (हे) गुरो, प्रपन्नं मां शाधि।'३०। इति सौष्ठव+औदार्य+रम्यां उक्तिं श्रुत्वा (श्रीगुरुः) तं 'तथा' इति ऊचे। द्विजः निजालयं निन्ये।३१। चित्रिते अलंकृते रङ्गवल्ल्यादि रंजिते गेहे सु+आसनेषु उपवेश्य अङ्गना+अन्वितः (सायंदेवः) उपतस्थे।३२।

**संन्याशाचे पूज्यत्व -** हे त्याचे औचित्यापूर्ण आणि उदार बोलणे ऐकून श्रीगुरूंनी त्याला होकार दिला. मग तो सायंदेव त्या सर्वांना आपल्या घरी घेऊन गेला.३१. नयनरम्य चित्रांनी, तोरण-पताकांनी तसेच आकर्षक रांगोळ्यांनी सजविलेल्या त्या घरी श्रीगुरूंना उत्तम आसनावर बसवून त्यांची परमेश्वरभावाने पूजा केली. श्रीगुरू साक्षात् भगवंत आहेत हे ज्ञान नसतांनाही, त्यांच्या वेदज्ञानाने, संन्यासित्वामुळे सायंदेवाच्या मनांत हे ईश्वररूप आहेत अशी बुद्धी उपजली. ही भगवद्गीतेच्या (१५:१) प्रतिपादनाशी जुळणारी आहे. ('वरती मुळे आणि खाली शाखा असलेल्या, वेद ज्याची पाने आहेत अशा अक्षय अश्वत्थाला जाणणारा वेदवेत्ता होय.') श्राद्धाच्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रांतही (२:१५) हेच सांगितले आहे. 'जेवढ्या म्हणून देवता आहेत त्या सर्व वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाच्या ठायी वसतात. त्यासाठी वेदज्ञ ब्राह्मणांना रोज नमस्कार करावा, त्यांचा आदर करावा, त्यांच्याशी अश्लील भाषण करूं नये. अशानेच देवता संतुष्ट होतात.' वित्त, दारा (पुत्र) आणि लोक या सर्वांच्या आसक्तीचा (एषणांचा) त्याग करून दण्डादि धारण करून भिक्षावृत्तीचा अंगीकार करणारा संन्यासी होतो. अशा संन्याशाला शास्त्रांनी साक्षात् विष्णूंचेच स्वरूप मानले आहे. असा यति ज्या घरी जेवतो तिथे साक्षात् विष्णूच जेवतात. ह्या ठिकाणी तर श्रीगुरू ब्रह्मस्वरूपच असल्याने हा भ्रम जरी मानला तरी संवादी भ्रमच होतो.३२.

**सूपचारैः प्रपूज्येशं रौद्रैर्मन्त्रैश्च पौरुषैः । नीराज्य श्रद्धया गीत-स्तोत्रादिभिरतोषयत् ।।३३।।**
**गुरुपादोदकं तीर्थं भक्त्या संपूज्य मुक्तिदम् । पीत्वैनोहारि सस्त्रीकः शिष्यान्सर्वानपूजयत् ।।३४।।**
**अन्नं चतुर्विधं स्वादु सुरसं गव्यसंयुतम् । प्रादात्प्रकामं सर्वेभ्यो मधुरोक्त्यादरेण सः ।।३५।।**

ईशं सु+उपचारैः रौद्रैः पौरुषैः च मन्त्रैः श्रद्धया प्रपूज्य नीराज्य गीत+स्तोत्रादिभिः अतोषयत्।३३। एनो+हारी मुक्तिदं गुरु+पाद+उदकं तीर्थं सस्त्रीकः भक्त्या संपूज्य पीत्वा सर्वान् शिष्यान् अपूजयत्।३४। सः चतुर्विधं स्वादु सुरसं गव्य+संयुतं अन्नं सर्वेभ्यो प्रकामं मुधर+उक्त्या आदरेण प्रादात्।३५।

त्याने उत्तम उपचारांनी, शतरुद्रीय आणि पुरुषसूक्त यांच्या मंत्रांनी श्रद्धापूर्वक सद्गुरूंचे पूजन केले, आरती केली आणि गीत, स्तोत्रे इत्यादींनी त्यांना प्रसन्न केले.३३. गुरुगीतेत *'शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः।'* असे गुरुचरणांच्या तीर्थाचे वर्णन आहे. अशा पापविनाशी आणि मुक्तिप्रद तीर्थाचे सपत्नीक भक्तिभराने षोडशोपचार पूजन करून सायंदेवाने ते प्राशन केले. तसेच सर्व शिष्यांचीही त्याने यथायोग्य पूजा केली.३४. यानंतर सायंदेवाने सर्वांना भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चारी प्रकारचे, दूध, दही, तूप, लोणी यांनी युक्त, मधुर अन्न आदराने आणि गोड (आर्जवी) भाषणासहित यथेच्छ खाऊं घातले. ते सहाही रसांनी चविष्ट केले होते. आयुर्वेदांत भोजन गोड असावे असे म्हटले आहे. तसेच गीतेनेही (१७:८) रसयुक्त, स्निग्ध, स्थिर आणि हृद्य आहाराला सात्त्विक म्हटले आहे. चतुर्विध अन्न - दांतानी तुकडे करून खाल्ले जाते ते अपूपादि **भक्ष्य**, न चावतां नुसते गिळले जाते ते पायसादि **भोज्य**, जिभेने चाटून खाल्ले जाणारे गूळ वगैरे **लेह्य**, दांतानी चोखून रस घेऊन नीरस भाग टाकून जे सेवन केवे जाते ते ऊस वगैरे **चोष्य**.३५.

**भुक्त्वान्नं गुरुपङ्क्त्यां स भेजे रुग्णोऽप्यनामयम । नेदं चित्रं हि यद्भक्ता घ्नन्त्युद्भवमहारुजम् ।।३६।।**
**स ततोऽसारसंसार-निर्विण्णो गुरुदर्शनात् । भूत्वा क्षणादुदासीनः सर्वतोऽभजदच्युतम् ।।३७।।**
**द्विजोऽपि भुक्तानाचान्तान्सूपविष्टान्सुगन्धिभिः । पत्सैवनैश्चास्यवासैस्तोषयित्वाऽब्रवीद्गुरुम् ।।३८।।**
**अङ्घ्य्रब्जवन्दनात्तेऽद्य सफलं जन्मकर्म मे । पितरोनुग्रहान्मुक्तास्तत्कृतार्थोऽस्मि निर्मलः ।।३९।।**

सः रुग्णः गुरु+पंक्त्यां अन्नं भुक्त्वा अनामयं भेजे। इदं चित्रं न हि यत्+भक्ताः उद्भव+महा+रुजं घ्नन्ति।३६। ततः असार+संसार+निर्विण्णः सः गुरुदर्शनात् (एव) क्षणात् उदासीनः सर्वतः अच्युतं अभजत्।३७। द्विजः अपि भुक्तान् आचान्तान्, सु+उपविष्टान् सुगन्धिभिः पत्+सेवनैः आस्य+वासैः तोषयित्वा गुरुं अब्रवीत्।३८। अद्य ते अंघ्रि+अब्ज+वंदनात् मे जन्म+कर्म सफलम्। अनुग्रहात् पितराः मुक्ताः। तत् निर्मलः कृतार्थः अस्मि।३९।

तो रोगी ब्राह्मणही श्रीगुरूंच्या पंक्तीला अन्न ग्रहण करून निरोगी झाला. श्रीगुरूंच्या पंक्तीला म्हणजे त्यांच्या शिष्यांच्या पंक्तीला असा अर्थ घ्यावा; किंवा श्रीगुरूंचे शिष्य सगळे संन्यासीच, अर्थात् गुरुस्थानीच असल्याने गुरूंची पंगत असाही अर्थ घेतां येईल. तसेच गरूंच्या पंक्तीला जेवला ह्यांत त्या रुग्णाचा समावेश श्रीगुरूंच्या शिष्यवर्गांत झाल्याचीही सूचना आहे. तो पोटशूळ बरा झाला यांत आश्चर्य कांहीच नाही; कारण श्रीगुरूंचे भक्त जन्ममरणरूपी महारोगाचाही नाश करतात.३६. केळीच्या खुंटासारख्या निस्सार संसारापासून विरक्त झालेला तो रोगमुक्त ब्राह्मण केवळ श्रीगुरूंच्या दर्शनानेच तत्काळ उदासीन झाला आणि सर्वभावे सच्चिदानंदस्वरूपापासून कधीही च्युत न होणाऱ्या सद्गुरूंचा भक्त झाला.३७. मग सायंदेव ब्राह्मणाने भोजन केरून आंचवलेल्या सर्वांना छानशा आसनांवर बसवून सुगंधी पदार्थ अर्पण केले. तसेच मुखवासही दिला. विडा (तांबूल) संन्याशांना निषिद्ध असला तरी विलायची किंवा लवंग सेवन करतां येते. मग त्याने श्रीगुरूंची प्रार्थना केली.३८. 'श्रीगुरुमहाराज! आपल्या चरणकमलांना वंदन केल्याने माझा जन्म आणि माझे सर्व कर्म सफल झाले आहेत. आपल्या कृपानुग्रहाने माझे सर्व पितरही मुक्त झाले आहेत. यामुळे आत्मज्ञानाला आड येणारी सर्व पापे नाश पावून मी निर्मल झालो आहे व मी कृतकृत्य झालो आहे.३९.

**गङ्गा पापं विधुस्तापं दैन्यं कल्पतरुर्हरेत् । वायुस्तूलमिवैतत्ते दर्शनं हरति त्रयम् ।।४०।।**
**साक्षी सर्वान्तरस्थस्त्वं परात्माऽधोक्षजोऽमलः । नृरूपेणावतीर्णोऽसि साधूंस्त्रातुमजोऽव्ययः ।।४१।।**
**देहि मे तेऽमलं दास्यं श्रद्धोपेतं कुलाय च । याचेऽदो भगवन्नेको ममाधिस्तन्निशामय ।।४२।।**
**यन्निघ्नोऽस्मि स वै हिंस्रो यवनो हन्ति भूसुरम् । प्रत्यब्दमाह्वयत्यद्य तदर्थमिति शुश्रुम ।।४३।।**

गङ्गा पापं, विधुः तापं, कल्पतरुः दैन्यं हरेत्। ते दर्शनं त्रयम् अपि वायुः तूलं इव हरति।४०। साक्षी सर्व+अंतरस्थं अधोक्षजः अमलः अजः अव्ययः त्वं साधून् त्रातुं नृ+रूपेण अवतीर्णः असि।४१। मे कुलाय च ते अमलं श्रद्धा+उपेतं दास्यं देहि अदः याचे। भगवन्, मम एकः आधिः निशामय।४२। (अहं) यत्+निघ्नः सः हिंस्रः यवनः प्रत्यब्दं भूसुरं हन्ति वै। तदर्थं अद्य (मां) आह्वयति इति शुश्रुम।४३।

गंगा पाप, चंद्रमा ताप आणि कल्पवृक्ष दैन्य दूर करतात. आपले दर्शन मात्र या तिन्हींना, वाऱ्याने कापूस उडवून लावावा, तसे पळवून लावतात.'४०. 'सर्वांच्या अंतर्यामी साक्षित्वाने राहणारा परमात्मा तूं आहेस. **अक्ष** म्हणजे नेत्रादि इंद्रियांना **अधः** म्हणजे अंतर्मुख केल्याने जो चित्तांत प्रकटतो तो अधोक्षज तूंच आहेस. रागद्वेषादि चित्ताचे मल धुऊन टाकणारा जन्ममरणादि विकाररहित अक्षय पुरुष असूनही तूं साधूच्या परित्राणाकरिता मानुष रूपाने अवतरला आहेस.४१. मला आणि माझ्या वंशाला आपले अव्यभिचारी आणि श्रद्धापूर्ण दास्य द्यावे हेच मागणे आहे. भगवंता, माझ्या मनाला एक घोर चिंता लागलेली आहे ती आपण ऐकावी.४२. माझा स्वामी असलेला क्रूर म्लेच्छ प्रतिवर्षी एका ब्राह्मणाला ठार करतो. त्यासाठीच त्याने आज मला बोलावले आहे असे आमच्या कानांवर आले आहे.४३. श्रीगुरू सायंदेवाला म्हणाले, भिऊं नकोस! तो यवन कितीही निष्ठुर असूं दे, तूं बिनधास्त त्याच्याकडे जा. तो तुझा सत्कारच करील. मग आनंदाने तूं परत ये. तोंपर्यंत मी इथेच थांबतो. चिंता सोड.४४.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**मा भीः क्रूरमपीदानीं यवनं याह्यसंशयम् । मुदैष्यस्यर्चितस्तेन तावत्तिष्ठामि मा शुचः ।।४४।।**
**इत्याकर्ण्यापशङ्कं स ययौ यवनमञ्जसा । शस्त्रैर्विप्रश्छिनत्तीति भ्रान्तोऽरं यवनस्तदा ।।४५।।**
**तं तुष्ट्वा वस्त्रभूषार्थैः प्राह गच्छ सुखं द्विज । सायंदेवोऽपि वीताधिर्हृष्टः श्रीगुरुमाययौ ।।४६।।**
**सर्पोऽप्यद्याद्विराजोऽर्भं हरेर्वेभो गुरुप्रियम् । न क्षमोऽप्यन्तको द्रष्टुं यवनः किमुताल्पकः ।।४७।।**
**दासोऽसीष्टं लभेत्ते मे द्व्यष्टाब्दैर्दर्शनं भवेत् । द्विजेत्युक्त्वा वैद्यनाथं गत्वान्तर्दध ईश्वरः ।।४८।।**

श्रीगुरुः उवाच। मा भीः। क्रूरं अपि यवनं असंशयं याहि। तेन अर्चितः मुदा एष्यसि। तावत् तिष्ठामि। मा शुचः।४४। इति आकर्ण्य सः अपशङ्कं अञ्जसा यवनं ययौ। तदा शस्त्रैः विप्रः (मां) छिनत्ति इति अरं भ्रान्तः यवनः।४५। तं वस्त्र+भूषा+अर्थैः तष्ट्वा प्राह, (हे) द्विज, सुखं गच्छ! सायंदेवः अपि वीत+आधिः हृष्टः श्रीगुरुं आययौ।४६। विराजः अर्भं सर्पो अद्यात् अपि हरेः वा (अर्भं) इभो (अद्यात्)? गुरु+प्रियं अंतकः अपि द्रष्टुं न क्षमः। किं उत अल्पकः यवनः?४७। (हे) द्विज, (मम) दासः असि। ते इष्टं लभेत्। द्वि+अष्ट+अब्दैः मे दर्शनं भवेत्। इति उक्त्वा वैद्यनाथं गत्वा ईश्वरः अन्तर्दधे।४८।

हे श्रीगुरूंचे आश्वासनपर भाषण ऐकून तो सायंदेव निःशंक मनाने लगेच त्या यवनाकडे गेला. त्या वेळी त्या यवनाला अशी गाढ भ्रांती झाली की एक ब्राह्मण आपले शस्त्राने तुकडे करतो आहे.४५. त्यामुळे प्रभावित होऊन त्याने सायंदेवाला वस्त्रे, अलंकार आणि द्रव्य देऊन सन्मानित केले आणि म्हणाला, अहो विप्रवर, आपण सुखाने घरी जा. त्याबरोबर मरणभय दूर झाल्याने हरखलेला सायंदेव श्रीगुरूंकडे परतला.४६. गरुडाच्या पिलाला कदाचित् सापही खाऊं शकेल किंवा सिंहाच्या छाव्याला हत्तीही गिळेल; परंतु गुरुभक्ताकडे पाहण्याचीही साक्षात् यमाचीही बिशाद नाही. मग त्या क्षुद्र यवनाची काय कथा?४७. यवनाकडून परतलेल्या सायंदेवाची आपल्याबरोबर येण्याची उत्सुकता जाणून श्रीगुरू म्हणाले, हे ब्रह्मश्री, तूं माझा दास आहेस. तुला तुझे अभीप्सित मिळेल. आणखी सोळा वर्षांनी तुला माझे

**ईदृश्योऽलौकिका लीलाः कृता भक्तिविधित्सया । भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु ।।४९।।**
**लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः । लौकिकानन्दजनकां चमत्कृतिमिहाकरोत् ।।५०।।**
**हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम् । भजनादेव निर्धूत-मला यान्ति मुमुक्षुताम् ।।५१।।**
**ततोऽभ्यासाच्च वैराग्यात्तं ध्यायन्त उपासते । महाप्रसादोऽनेनैव लभन्ते सद्गुरोर्नताः ।।५२।।**

ईदृश्याः अलौकिकाः लीलाः भक्ति+विधित्सया कृताः। कथं अपि लोका मां भजेयुः इति तु अस्य आशयः।४९। अनेन हेतुना तत् लोका भगवत्+पदं भजन्ति। भजनात् एव निर्धूत+मलाः मुमुक्षुतां यान्ति।५०। लोके प्रति+उपकारित्वं समीक्ष्य भगवान् विभुः इह लौकिक+आनंद+जनकां चमत्कृतिं अकरोत्।५१। ततः अभ्यासात् वैराग्यात् च तं ध्यायन्तः उपासते। अनेन एव नताः सद्गुरोः महाप्रसादः लभन्ते।५२।

दर्शन होईल. असे आश्वासन त्याला देऊन श्रीगुरू (परळी) वैद्यनाथाला जाऊन गुप्तपणे राहिले.४८. अशा अलौकिक दिव्य लीला श्रीगुरूंनी भक्तिमार्गाच्या संस्थापनेसाठी केल्या. त्यांचा हेतु हाच की स्नेहाने वा लोभाने, कशाही प्रकारे लोकांनी आपली भक्ती करावी.४९. आपल्या (भगवंताच्या) भजनावीण लोकांना मोक्षाची योग्यता येणार नाही; आणि त्यांना तर भजनांत अजिबातच रस नाही. त्यामुळे त्यांच्या सांसारिक इच्छा पुरवून त्यांच्यांतील प्रत्युपकाराची भावना जागवावी आणि अशा रीतीने तरी त्यांना आपल्या भक्तीला लावावे यासाठीच त्यांना सुखविणारे चमत्कार तो सर्वव्यापी भगवंत करीत असतो.५०. या निमित्ताने ते लोक सगुण परमात्म्याची अर्चन, वन्दन (*श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।*) आदि नऊ प्रकारे (१) **सकाम भक्ती** करतात. या भक्तीच्या प्रभावाने त्यांच्या चित्तांतील मल नाहीसे होऊन त्यांच्या ठिकाणी मुक्तीची इच्छा (२. **मुमुक्षा**) निर्माण होते.५१. त्यानंतर मुक्तीसाठी प्रयत्नशील झालेला तो (३) **साधक** अभ्यास आणि वैराग्य धारण करून त्या भगवंताचे चिंतन करीत त्याची उपासना करतो. उपासना याचा अर्थ तत्परता. संसारांत जसे आपण 'मी येतो, मी

**ऐक्यज्ञानं तदा लब्ध्वा महावाक्येन चात्मनोः । शान्तिं विनिहिताविद्यास्तत्संस्थां यान्ति ते ध्रुवाम् ।।५३।।**
**प्रसन्नात्मानः प्रशान्ता निर्बन्धा द्वैतवर्जिताः। स्वात्मारामाश्चरन्त्यत्र जडोन्मत्तपिशाचवत् ।।५४।।**

तदा ते महावाक्येन च ऐक्यज्ञानं लब्ध्वा वि+नि+हता+अविद्याः तत्+संस्थां ध्रुवां शान्तिं यान्ति।५३। द्वैतवर्जिताः निर्बन्धाः प्रसन्न+आत्मानः प्रशांताः स्वात्मारामाः अत्र जड+उन्मत्त+पिशाच+वत् चरन्ति।५४।

जातो, हा माझा देह आहे, हे माझे घर आहे' असा सतत आस्थेने व्यवहार करतो आणि मग त्याचाच अध्यास दृढ होत जातो. त्याचप्रमाणे जर 'मी ब्रह्म आहे' अशी आस्था निरंतर ठेवून त्याचप्रमाणे व्यवहार करण्याचा अभ्यास करणे हीच उपासना. ह्या उपासनेने आपण देह आहोत अशा ज्ञानाचा निरास करणारे (देहात्मज्ञानबाधक), देहात्मज्ञानासारखे 'मी ब्रह्म आहे' असे आत्मज्ञान सुलभ होते. ह्याच **उपासने**ने (४) सद्गुरूंचा महाप्रसाद होतो.५२. म्हणजेच शब्दज्ञान आणि अपरोक्षज्ञान यांत निष्णात असलेले कृपासागर सद्गुरू महावाक्याचा उपदेश (५. **श्रवण**) करतात. 'तो तूं आहेस' या महावाक्यातील भागत्यागलक्षणेच्या लक्षित अर्थाच्या अनुसंधानात्मक (५) **मनना**ने आणि (६) **निदिध्यासना**ने अविद्येचा तिच्या कार्यासहित (प्रपंचासहित), विशेष (**वि**) आणि (**नि**) समूळ नाश (**हता**) करून साधक-भक्त प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अखंडरस ऐक्य अनुभवतो. म्हणजेच अपरोक्षज्ञानाच्या प्राप्तीने स्वात्मरूपांत विलीन होतो. आणि त्या आत्मज्ञानांतील पुनरावृत्तिरहित, निर्वाणलक्षण शांती पावतो. निरतिशय आनंदघन चैतन्यांत निरंतर डुबून राहतो.५४.

शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यांत (१:१:४) स्पष्ट केल्याप्रमाणे ब्रह्मभावांत स्थिरावल्यावर तो पूर्वीसारखा संसारी राहत नाही; पूर्वीसारख्या संसारी माणसाला ब्रह्मज्ञान झालेले नसते. जीवन्मुक्ताला आपले असे कुणी राहत नाही वा तो कुणाचाही राहत नाही. यावर कुणी म्हणतील की, 'मग लौकिक, वैदिक सर्वच कर्मांचा लोप होऊन त्याला प्रत्यवाय

दोष लागणार नाही का?' पण त्याला 'मीच ब्रह्म आहे' असा आनंदपूर्ण अद्वैत बोध झाला असल्याने तो कृतकृत्य होतो (परमहंसोपनिषत् ९). आत्मा आणि परमात्मा यांच्या एकत्वाच्या ज्ञानाने होणारा भेदाचा भंग हीच संध्या तिचे आत्मसमाधीतच आचरण करावे असे उपनिषदाचे प्रतिपादन आहेत. श्रीमद्भगवद्गीतेतही (३:१७) म्हटलेले आहे, जो आत्म्यांतच रमलेला आहे आणि आत्मानंदाने तृप्त होऊन आत्म्यामध्येच संतुष्ट आहे त्याला कांहीही करावयाचे राहत नाही.' योगवासिष्ठांतच (५:७७:२९) जीवन्मुक्ताची लक्षणे सांगतांना सूर्य शीतल झाला, चंद्रमंडल उष्ण झाले किंवा अग्नीच्या ज्वाळा खालच्या दिशेने जरी पसरल्या तरी जीवन्मुक्ताला आश्चर्य वाटत नाही असे सांगितले आहे. *('अपि शीतरुचावर्के उष्णे पीयूषमण्डले। अप्यधःप्रसरत्यग्नौ जीवन्मुक्तो न विस्मयी।।')* साहजिकच तो इतरांना जड (मंदमति), उन्मत्त (वेडा) किंवा पिशाच यांच्यासारखा वाटतो. वर वर्णन केल्यानुसार त्याच्या मनांतील द्वैतभावच लोपलेला असल्याने ज्ञानाच्या पूर्वींचे प्रापंचिक व्यवहार लोप पावतात.

*'योगभूमिः - शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता। विचारणा द्वितीया स्यात्तृतीया तनुमानसा। सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यादसंसक्तस्तु पञ्चमी। पदार्थाभावनी षष्ठी सप्तमी तुर्यका स्मृता। आद्यत्रयं जागरतं साधकस्य प्रकीर्तितम्। तुर्या स्वप्नः साधकोऽत्र प्राज्ञैर्ब्रह्मवदुच्यते। निद्रा तु पञ्चमी ब्रह्मवद्वरोऽत्र उच्यते। षष्ठी तु गाढनिद्रा स्याद्वरीयानत्र स स्मृतः। ज्ञेयं परत उत्थानमस्य भावितचेतसः। अन्त्या तुरीयात्र ब्रह्मवद्वरिष्ठो महामतः। स्वतो वा परतो वाऽस्य व्युत्थानं नैव कर्हिचत्, इति।'*

**योगभूमिका -** यांनाच ज्ञानभूमिका असेही म्हणतात, योगवासिष्ठाच्या उत्पत्तिप्रकरणांत ११८व्या सर्गांत वर्णिलेल्या आहेत. क्षणभंगुर, आभासमात्र, पराधीन ऐंद्रिय उपभोगांचा वीट येऊन नित्य, शाश्वत, निरतिशय आणि स्वतंत्र अशा स्वात्मसौख्याची इच्छा होणे आणि त्यासाठी शास्त्र आणि सतंसंग यांच्याकडे प्रवृत्ती होणे ही (१) **शुभेच्छा** नांवाची

पहिली ज्ञानभूमिका होय. इंद्रियांपासून विरक्त होऊन शास्त्रांचा अभ्यास करणे, सज्जनांच्या संगतीत सदाचारपूर्वक श्रवण-मनन घडूं लागले की दुसरी (२) **विचारणा** नांवाची भूमिका सिद्ध झाली असे समजायला हरकत नाही. या दोन भूमिकांचा अभ्यास प्रगाढ होऊन इंद्रिये विषयापासून परावृत्त होऊं लागली, अनासक्ती मनांत स्थिरावली की तिसरी (३) **तनुमानसा** ही भूमिका प्राप्त होते. पहिल्या तीन भूमिकांत साधकाची जागृतावस्था असते. त्याला बाह्य जगताचे पूर्ण भान असते. या तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासाने विषयांपासून पूर्णपणे विरक्त झालेले मन (वशीकरणसंज्ञा वैराग्य) सच्चिदानंद आत्मस्वरूपांत स्थिर झाले की चौथ्या (४) **सत्त्वापत्ती** नांवाच्या भूमिकेवर योगी आरूढतो. ह्या भूमिकेतील योगी ब्रह्मवित् (ब्रह्मज्ञानी) म्हणविला जातो. ह्या तुर्या किंवा समाधी अवस्थेत साधकाला बाह्य जग स्वप्नवत् होते. ही ब्रह्मज्ञानाची पहिली अवस्था आहे. या चार भूमिकांच्या दृढ अभ्यासाने साधक आत्मस्वरूपांत रमून जातो आणि बाह्य जगताचे त्याला भान नसते. हीच पांचवी (५) **असंसक्ती** भूमिका आहे. ही साधकाची निद्रा आहे. ह्या योग्याला ब्रह्मविद्वर असे म्हणतात. सहाव्या भूमिकेत योगी बाह्य जगताचा संबंध संपूर्णपणे तुटल्याने योग्याला जगांतील पदार्थांचे भान राहत नाही. ह्या (६) **पदार्थाभावनी** स्थितीतील योग्याला (**ब्रह्मविद्वरीयान्**) समाधीतून उठविण्यासाठी दुसऱ्या कुणाच्या तरी प्रयत्नांची आवश्यकता असते (**परतो व्युत्थान**). यानंतरची चरम ज्ञानभूमिका (सातवी किंवा ज्ञानी पुरुषांची चौथी श्रेणी - **तुरीया**) प्राप्त झालेला योगी अखंड समाधीत मग्न असतो. तिच्यांतून तो स्वतःच्या वा दुसऱ्याच्या प्रयत्नांनीही भानावर येत नाही. हा ब्रह्मविद्वरिष्ठ होय.

**स्पर्शेक्षाकीर्तनादीनां सद्गुरोर्महिमा त्वियान् । स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वापि धत्ते यत्र मनोऽचलम् ।।५५।।**
**तत्सारूप्यं स पेशस्कृद्ध्यानात्कीट इवैत्यरम । इत्याद्या मार्गणोपाया हरेः स्युः सुलभा नृणाम् ।।५६।।**
**मृग्योऽसौ पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः । नानुमानैरतो युक्त आत्मैवात्मगुरुः किल ।।५७।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भूतेशोऽन्तर्दधे कस्मात्तेजस्वी भक्तवत्सलः । शिष्यास्तस्थुस्तदा कुत्र तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।५८।।**

सद्गुरोः स्पर्श+ईक्षा+कीर्तन+आदीनां इयान् महिमा। स्नेहात् द्वेषात्, भयात् वा अपि यत्र मनः अचलं धत्ते।५५। स पेशस्कृत्+कीट इव तत्+सारूप्यं एति। इति+आद्याः हरेः मार्गण+उपायाः नृणां सुलभाः।५६। असौ पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः। न अनुमानैः। अतः आत्मा एव आत्म+गुरुः युक्तः किल।५७। नामधारक उवाच। तेजस्वी भक्तवत्सलः भूतेशः कस्मात अन्तर्दधे? तदा शिष्याः कुत्र तस्थुः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।५८।

एवढा सद्गुरूंच्या स्पर्श, दर्शन, कीर्तन इत्यादिकांचा महिमा आहे. व्रजगोपिकांप्रमाणे प्रेमाने, शिशुपालादिकांप्रमाणे द्वेषाने किंवा कंसादींप्रमाणे भयाने जिथे कुठे कुणीही अभ्यास-वैराग्यांनी मन स्थिर करील,५५. त्याला ध्येय वस्तूचे सारूप्य प्राप्त होते. कुंभारीण माशीच्या चिंतनाने जसे अळीलासुद्धां पंख फुटून तिची कुंभारीण माशीच होते तसेच हे आहे. असे हे परमात्म्याच्या प्राप्तीचे उपाय मानवमात्रांना सहज उपलब्ध आहेत. यासाठी जाती, वय, लिंग इत्यादींचा कांही नियम नाही.५६. ह्या भगवंताचा नरजन्मांतच बुद्धी इत्यादि साधनांनी शोध घ्यायचा आहे. मात्र केवळ तर्काने तो सांपडणार नाही. यासाठी आपणच आपले गुरू असतो हे खरोखर योग्यच आहे.५७. नामधारक विचारतात - तेजःपुंज आणि भक्तवत्सल असे भगवान कां बरे गुप्त झाले? आणि मग शिष्यवर्ग कुठे राहिला? हे सर्व जाणण्यास मी सादर आहे.५८.

### ।। सिद्ध उवाच ।।

**सर्वे शिष्या भविष्याम इति मत्वात्र यान्त्यतः । मत्वा स्थेयं रह इति छात्रान्सद्गुरुरब्रवीत् ।।५९।।**
**लब्ध्वा द्विजत्वं संस्कारैर्ब्रह्मचारी पठन्त्रयीम् । द्वादशाब्दं कृती सूत्र-मेखलाजिनदण्डधृक् ।।६०।।**
**सायं प्रातः स कर्माग्नि-कार्यं भिक्षां चरन्गुरुम । भजन्भक्त्याऽस्वपन्नह्नि याचितां गुरवेऽर्पयन् ।।६१।।**
**तद्दत्तभुग्लब्धविद्यः स्नायाद्दत्वा वरं व्रती । अनाश्रमी न तिष्ठेत भवेत्स प्रत्यवाय्यतः ।।६२।।**

सिद्ध उवाच। 'सर्वे शिष्या भविष्यामः इति मत्वा अत्र यान्ति अतः रह स्थेयं' इति मत्वा सद्गुरुः छात्रान् अब्रवीत्।५९। संस्कारैः द्विजत्वं लब्ध्वा ब्रह्मचारी कृती सूत्र+मेखला+अजिन+दण्ड+धृक् द्वादश+अब्दं त्रयीम् पठन्।६०। तत्+दत्त+भुक् लब्ध+विद्या व्रती वरं दत्वा स्नायात्। अनाश्रमी न तिष्ठेत। सः प्रत्यवायी भवेत्।६१। सः सायं प्रातः कर्म, अग्नि+कार्यं, भिक्षां चरन् गुरुं भक्त्या भजन्, अह्नि अस्वपन्, याचितां (भिक्षां) गुरवे अर्पयन्।६२।

केवळ आपल्या भजनानेच शिष्याचा उद्धार करण्याचे सामर्थ्य असूनही परंपरेचे रक्षण करण्यासाठी तसेच शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी भगवंत गुप्त झाले हे स्पष्ट करण्याच्या हेतूने सिद्धमुनी उत्तर देतात. 'सगळे - अधिकारी आणि अनधिकारीही, 'आपणही शिष्य होऊं' या अशा विचाराने आपल्याकडे येतील तरी एकांतवास स्वीकारावा' असा विचार करून सद्गुरू शिष्यांना म्हणाले.५९.

**ब्रह्मचर्याश्रम -** कर्मकांडांत पुढे सांगण्यांत येणाऱ्या कर्मांनी द्विजत्व प्राप्त करून यज्ञोपवीत (जानवे), मेखला (कडदोरा), कृष्णाजिन आणि दंड धारण करणाऱ्या कुशल ब्रह्मचाऱ्याने बारा वर्षे ऋक्, यजु आणि साम या वेदत्रयीचे पठण करावे. त्रयी या स्त्रीलिंगी शब्दाचा अमरकोशांत (१:६:३) हाच अर्थ दिला आहे.६०. अशा रीतीने सद्गुरूंच्याकडून विद्या संपादन केल्यावर त्यांना गुरुदक्षिणा देऊन समावर्तन करावे. आश्रमाविरहित राहू नये; कारण त्याने प्रत्यवाय दोष लागतो.६१. त्याने सकाळ-संध्याकाळ संध्यावंदनादि नित्यकर्मे, अग्निसाठी समिधा आणणे इत्यादि कर्मे तसेच भिक्षा यांचे आचरण करावे, दिवसां झोपू नये आणि आणलेली भिक्षा गुरूंना अर्पण करावी.६२.

**स्नातकस्तूद्वहेद् भार्यां गृह्यं परिचरेद् गृही । पोष्यभृद्यज्ञकृद्वेद-शास्त्रधर्मपरो भवेत् ।।६३।।**
**पुत्रार्पितश्रीर्भार्यायुगग्राम्यविषयो वने । यतात्माऽकृष्टपच्याशी यावच्छुद्ध्यन्तरं वसेत् ।।६४।।**
**स्वारोपिताग्निः स वान-प्रस्थो भार्याज्ञयाऽममः । प्रव्रजेद्यतिधर्मज्ञो विरक्तस्तु कुतोऽपि हि ।।६५।।**

स्नातकः तु भार्यां उद्वहेत्। गृही गृह्यं परिचरेत्। पोष्य+भृत् यज्ञ+कृत् वेद+शास्त्र+धर्म+परः भवेत्।६३। पुत्रार्पित+श्रीः भार्या+युक् अग्राम्य+विषयः यतात्मा अकृष्ट+पच्य+आशी यावत् शुद्धि+अन्तरं वने वसेत्।६४। सः वानप्रस्थः स्व+आरोपित+अग्निः भार्या+आज्ञया अममः यति+धर्मज्ञः प्रव्रजेत्। विरक्तः तु कुतः अपि।६५।

**गृहस्थाश्रम -** विद्येत न्हालेला किंवा व्रताने शुद्ध झालेला किंवा दोन्ही तो स्नातक. सोडमुंज झाल्यावर भार्येचे पाणिग्रहण करावे. इथे 'तु' शब्दाने गृहस्थाश्रम ऐच्छिक असल्याचे सुचविलेले आहे. सामर्थ्य असेल तर नैष्ठिक ब्रह्मचर्य स्वीकारावे अशा अर्थाचे स्मृतिवचन आहे. गृहस्थाने आपल्या गृह्यसूत्रानुसार धर्माचरण करावे. यांत अग्निपरिचर्येचाही समावेश जाणावा. मुंडकोपनिषदांत (१:२:३) सांगितल्याप्रमाणे, अग्निहोत्र, दर्श, पौर्णिमास, आग्रयण, चातुर्मास, वैश्वदेव इत्यादि होम न करणाऱ्या किंवा विधीशिवाय होम करणाऱ्या आणि अतिथींचा सत्कार न करणाऱ्याचे सातही लोक नाश पावतात. याच अभिप्रायाने गृहस्थाने पोष्यांचे पोषण करावे आणि यज्ञांचे अनुष्ठान करावे असे म्हटले आहे. त्याने वेद आणि शास्त्रांत पुरस्कारलेल्या धर्माचे परिपालन करावे. कर्मकांडांत हा विषय अधिक स्पष्ट होणारच आहे.६३. **वानप्रस्थाश्रम -** गृहस्थाश्रमाचा समारोप करून सर्व संपत्ती पुत्राला देऊन, भार्येसह किंवा एकट्यानेच ग्राम्य विषयांचा त्याग करून, मनाचे नियमन करून, शेतीतून पिकवलेल्या धान्याशिवाय इतर आहार ग्रहण करून चित्तशुद्धी होईपर्यंत वनांत राहावे.६४. **संन्यासाश्रम -** (चित्तशुद्धीनंतर) त्या वानप्रस्थाने अग्नीचा समारोप करून भार्येच्या संमतीने निर्मम होऊन यतिधर्माचे ज्ञान करून घेऊन संन्यास ग्रहण करावा. यति म्हणजे इंद्रियांवर विजय मिळवलेला. हा क्रम वैराग्याच्या अभावी सांगितलेला आहे. वैराग्य उत्पन्न झाले तर ब्रह्मचर्याश्रमांतून किंवा गृहस्थाश्रमांतूनही संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. ज्या दिवशी विरक्ती उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास घ्यावा असे जाबालोपनिषदाचे (४) वचन आहे. हि शब्दाच्या योजनेतून आचार्यादिकांच्या उदाहरणावरून हे प्रसिद्धच असल्याचे सुचविले आहे.६५.

**त्रिकालस्नायी संन्यासी न्यस्तसूत्रशिखैषणः । जपभिक्षाटनध्यान-शौचार्चनरतो वशी ।।६६।।**
**स्त्रीकथालौल्ययानाहः-स्वापखट्वाऽस्पृगात्मदृक् । सद्वेणुमृद्दार्वलाबु-मयभाजनदण्डधृक् ।।६७।।**
**सकृदह्न्याप्तसद्भिक्षा-भुक्शान्तस्तत्त्वचिन्तकः । तीर्थान्यटन्नृते वर्षास्त्र्यहमेकस्थले वसन् ।।६८।।**
**स्थिरीकृतमनाः क्वापि ततस्तिष्ठन्सुखी भवेत् । अशक्तस्तु महाक्षेत्रे हरिं ध्यायन्वसेत्सदा ।।६९।।**

त्रिकालस्नायी संन्यासी। न्यस्त+सूत्र+शिखा+एषणः जप+भिक्षा+अटन+ध्यान+शौच+अर्चन+रतः वशी।६६। स्त्रीकथा+लौल्य+यान+अहः+स्वाप+खट्वा+अस्पृक् आत्म+दृक् सत्+वेणु+मृत्+दारु+अलाबु+मय+भाजन+दण्ड+धृक् ।६७। सकृत्+अह्नि+आप्त+सत्+भिक्षा+भुक् शान्तः तत्त्व+चिन्तकः वर्षाः ऋते तीर्थानि अटन् त्रि अहं एक+स्थले वसन्।६८। स्थिरी+कृत+मनाः ततः क्व अपि तिष्ठन् सुखी भवेत्। अशक्तः तु हरिं ध्यायन् सदा महाक्षेत्रे वसेत्।६९।

तीन वेळां स्नान करण्याचा नियम कुटीचक आणि बहूदक यांना लागूं आहे. हंस संन्याशाने एकदांच स्नान करावे आणि परमहंसाला कांहीच नियम नाही (नारदपरिव्राजक उ. ४:२३). संन्यासाचे दोन प्रकार - पहिला विद्वत्संन्यास आणि दुसरा विविदिषासंन्यास. जानवे, शेंडी आणि तीन एषणांचा त्याग केल्याने होणाऱ्या विविदिषा संन्यासाने कृतकृत्यता प्राप्त होते. म्हणून त्याचे धर्म पुढे सांगितले आहेत. जितेंद्रिय होऊन प्रणवाचा जप, भिक्षा, संचार, ध्यान, शौच आणि देवपूजा ह्या कर्मात त्याने निमग्न राहावे.६६. स्त्रियांच्या गोष्टी, इंद्रियांचे लाड, वाहन, दिवसा झोप आणि खाट (पलंग) यांना स्पर्शही करू नये. आत्म्याच्या चिंतनात राहावे. चांगल्या वेळूचा, मातीचा, लांकडाचा किंवा भोपळ्याचा कमंडलु तसेच दंड धारण करावा.६७. दिवासांतून एकच वेळ मागून आणलेली शुद्ध भिक्षा ग्रहण करावी. माधुकरी, तात्कालिक, किंवा अयाचित यांसारखी भिक्षा चांगली समजावी. पावसाळ्याचे दिवस सोडून (चातुर्मास, आषाढ शुद्ध पौर्णिमा ते भाद्रपद शुद्ध पौर्णिमा हे दोन महिने संन्याशांचा चातुर्मास असतो.) सतत तीर्थयात्रा करावी. एका गांवी तीन दिवसांपेक्षां अधिक राहूं नये.६८. मन स्थिर झाल्यावर - निर्बीजसमाधीची प्राप्ती झल्यानंतर मग कुठेही राहून सुखी व्हावे. **सुखी** म्हणजे बुद्धिग्राह्य अतींद्रिय स्वात्मसौख्यांत रमून राहावे. अशक्ताने मात्र सतत ईश्वराचे ध्यान करीत काशी आदींसारख्या महाक्षेत्रांत राहावे.६९.

**तस्मात्कृध्वं स्वाश्रमार्हं कृत्यं पातोऽन्यथा भवेत् । इत्युक्त्वान्यान्प्रेरयित्वा गृहेभ्योऽजोऽब्रवीद्यतीन् ।।७०।।**
**काशी प्रयागो गया च श्रीरङ्गः पुरुषोत्तमः । श्रीशैलो नैमिषारण्यं कुरुक्षेत्रं बदर्यपि ।।७१।।**
**गोकर्णः शङ्खकर्णश्च काञ्च्ययोध्या च गोकुलम् । मथुरा द्वार्वती मायावंतिका करवीरपूः ।।७२।।**
**गन्धर्वपूर्हरिहर-क्षेत्रं सद्देवकन्यका । गुहाश्रमः सेतुबन्ध इत्यादिक्षेत्रविस्तरः।।७३।।**

तस्मात् स्व+आश्रम+अर्हं कृत्यं कृध्वम्। अन्यथा पातः भवेत्। इति उक्त्वा अन्यान् गृहेभ्यो प्रेरयित्वा अजः यतीन् अब्रवीत्।७०। काशी, प्रयागः, गया च श्रीरङ्गः, पुरुषोत्तमः, श्रीशैलः, नैमिषारण्यं, कुरुक्षेत्रं, बदरि अपि;।७१। गोकर्णः, शङ्खकर्णः, काञ्ची, अयोध्या, च गोकुलम्, मथुरा, द्वार्वती, माया, अवंतिका, करवीरपूः,।७२। गन्धर्वपूः, हरिहर+क्षेत्रं, सत्+देवकन्यका, गुहाश्रमः, सेतुबन्धः इत्यादि क्षेत्रविस्तरः।७३।

हे सर्व आपापल्या आश्रमाला योग्य असे कर्म तुम्ही सर्वांनी करावे. अन्यथा प्रत्यवायाचा दोष लागून अधःपात होतो, असे जन्मादिविकारातीत श्रीगुरूंनी सर्वांना सांगून आपापल्या घरी त्यांना पाठविले. याला प्रमाण म्हणून मनुस्मृतीचा पुढील श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. *‘अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसज्जञ्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति*।।११:४४।।’ (विहित कर्माचा त्याग करून विषयांच्या आसक्तीने निंद्य कर्म आचरणारा पुरुष पतन पावतो.) इतर सर्व आश्रमांतील पतितांना प्रायश्चित्ताने शुद्धी होऊ शकते. संन्यासाश्रमांतून पतन पावलेल्याला मात्र प्रयत्नाने कदाचित् आमुष्मिकी (परलोकांत) शुद्धी असली तरीही इहलोकांत प्रायश्चित्ताचे विधान कुठेही शास्त्रांत सांपडत नाही. तो देहाने आमरण अशुद्धच राहतो. शास्त्र आणि रूढी या दोन्ही पक्षी तो बहिष्कृतच ठरतो (ब्रह्मसूत्र ३:४:४३). त्याचप्रमाणे नैष्ठिक ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेल्यालाही प्रायश्चित्त नाही (अत्रिस्मृति ८:१६). त्यालाही कदाचित् आमुष्मिकी शुद्धी असेलही; पण शास्त्रदृष्ट्या भ्रष्ट झाल्याने व त्यासाठी दैहिक प्रायश्चित्ताचे विधान नसल्यामुळे तो पतितच राहतो (ब्रह्मसूत्र ३:४:४१). खालच्या आश्रमांतून वरच्या आश्रमांत चढतां येते;

**गङ्गासरस्वत्यर्कोत्था विपाट्पौष्णी मरुद्वृधा । वितस्तासिक्न्यनेकास्या चन्द्रभागा पयस्विनी ।।७४।।**
**शरावती मधुमती रेवा गोदाऽमरोद्भवा । सरयू कौशिकी पूर्णा भीमा कृष्णा मलापहा ।।७५।।**
**कावेरी प्रवरा तुङ्गा क्षिप्रा तापी च वेदिका । चर्मण्वती गण्डकीति पूर्वा नद्यो नदा अपि ।।७६।।**
**तत्संगमा अप्यघघ्नास्तीर्थान्यन्यान्यनेकशः । तीर्थानि गुरुसंचाराच्छश्वद्द्वादशसिन्धुषु ।।७७।।**

गङ्गा, सरस्वती, अर्क+उत्था, विपाट्, पौष्णी, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी, अनेकास्या, चन्द्रभागा, पयस्विनी।७४। शरावती, मधुमती, रेवा, गोदा, अमर+उद्भवा, सरयू, कौशिकी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलापहा।७५। कावेरी प्रवरा, तुङ्गभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इतिपूर्वा नद्यः, नदा अपि।७६। तत् संगमा अपि अघघ्नाः अन्यानि अनेकशः तीर्थानि। गुरु+संचारात् द्वादश सिन्धुषु,।७७।

पण वरच्या आश्रमांतून खालच्या आश्रमांत उतरतां येत नाही. निम्न आश्रमांत अवरोहण करण्याला आसक्तीच कारण आहे. ही आसक्तीच मिथ्या ज्ञानांतून उद्भवलेली असल्याने निषिद्ध आहे (ब्रह्मसूत्र ३:४:४०). नंतर ते आपल्या संन्यासी शिष्यांना तीर्थांचे परिभ्रमण करायला सांगतात.७०.

**तीर्थयात्रा -** काशी, प्रयाग, गया, श्रीरंगपट्टण, पुरुषोत्तम, श्रीशैल्य, नैमिषारण्य, कुरुक्षेत्र, बदरिनाथ, गोकर्ण, शंखकर्ण, कांची, अयोध्या, गोकुळ, मथुरा, द्वारका, हरिद्वार, उज्जैन, कोल्हापूर, गाणगापूर, हरिहर, कन्याकुमारी, कार्तिकस्वामी, रामेश्वर आणि इत्यादि शब्दांतून प्रभास, सिद्धपूर आदि क्षेत्रांचा निर्देश समजावा.७१-७३. गंगा, सरस्वती, यमुना, व्यास (बियास), रावी, मरुवर्मन, झेलम, चिनाब, सहस्रमुखी, चन्द्रभागा, पयस्विनी,७४. शरावती, मधुमती, गोदा, अमरजा, शरयू, कोसी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलप्रभा,७५. कावेरी, प्रवरा, तुंगभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इत्यादि नद्या आणि शोणभद्रादि नदसुद्धां (समुद्राला न मिळतां भूमीवरच संपणारे जलप्रवाह).७६. तसेच त्यांचे संगमही पापनाशक आहेत. पुष्कर, मानस, बिन्दु अशी इतर अनेक तीर्थे आहेत. गुरूच्या संचारानुसार तीर्थे बारा नद्यांत वास करतात. सिंहेला गुरू असतांना गोदावरी, कन्येला असतां कृष्णा, तुळेला असतां मलप्रभा, इत्यादि.७७.

**प्रचरन्ति सदा तास्तु स्वर्णदीस्नानपुण्यदाः । कृध्वं स्नानादि विधिवत्सर्वत्रात्र सरःस्वपि ।।७८।।**
**ग्रीष्मे रजस्वला नद्यो यद्दिनेऽम्बु नवं तदा । दशाहं नर्ते तीरस्थैः स्नानं मुख्यासु तु त्र्यहम् ।।७९।।**
**द्युरात्रमपि कूपादौ चरित्वैवं ततोऽखिलाः । श्रीशैलं बहुधान्येऽब्दे यात यास्याम्यहं ह्यपि ।।८०।।**

तीर्थानि प्रचरन्ति। तदा तु ताः स्वर्णदी+स्नान+पुण्यदाः। अत्र सर्वत्र सरःसु अपि विधिवत्, स्नानं कृध्वम्।७८। ग्रीष्मे यत् दिने अम्बु नवं तदा नद्यः रजस्वलाः। ऋते तीरस्थैः दशाहं, मुख्यासु त्र्यहं स्नानं न (कार्यम्)।७९। कूपादौ अपि द्युरात्रम्। एवं चरित्वा ततः अखिलाः बहुधान्ये अब्दे श्रीशैलं यात। हि अहं अपि यास्यामि।८०।

(**अर्कोत्था** = यमुना, **विपाट्**(श्) = बियास; **पौष्णी** (पुरुष्णी) = रावी; **मरुद्वृधा** = मरुवर्मन; **वितस्ता** = झेलम; **असिक्नी** = चिनाब; **कौशिकी** = कोसी)

त्या काळांत त्या नद्यांत स्नानाचे पुण्य गंगास्नानापेक्षांही अधिक आहे. ह्या सर्व तीर्थांत तसेच निरनिराळ्या सरोवरांतही सर्वांनी विधिपूर्वक स्नान, दान, श्राद्ध, ब्राह्मणभोजनादि कर्मे करावीत. महानदी आणि महाक्षेत्रांच्या ठिकाणी क्षौर करावे. सर्वत्र करण्याची आवश्यकता नाही.७८. आषाढ महिन्यांत जेव्हां नदीला नवीन पाणी येईल त्या वेळी त्या दहा दिवस रजःस्वला होतात. त्या काळांत तीरस्थांखेरीज इतरांनी दहा दिवस नदीवर स्नान करूं नये. महानदीसाठी हा काळ फक्त तीनच दिवसांचा आहे. कांही जणांच्या मते महानदींना रजस्वलत्व नाही.७९. आड, विहीर, तलाव इत्यादींनाही दोन दिवसांचे रजस्वलत्व पाळावे. अशी सर्व तीर्थयात्रा पूर्ण करून, ‘बहुधान्य संवत्सराला सर्वांनी श्रीशैल्याला यावे. आपणही त्या वेळी तिथे येऊं’ असे श्रीगुरूंनी सर्वांना सांगितले.८०. अशा रीतीने सर्व शिष्यवर्गांना तीर्थयात्रेला जाण्याची आज्ञा श्रीगुरूंनी केली आणि तेही त्यानुसार निघून गेले. मी मात्र श्रीगुरुचरणकमलांचा भ्रमर होऊन तिथेच राहिलो.८१.

**इत्युक्त्वा प्रेरयामास यात्राया अपि ते ययुः । तत्रैव सद्गुरुपद-पद्मालिरभवं त्वहम् ।।८१।।**
**(क्षेपकौ) यद्वर्जुनाभ्यां विद्योगौ प्राहैष प्राग्यथा तथा । गुह्यौ मे प्राह ते शिष्य विनीत कथयामि ते ।।८२।।**
**इत्युक्त्वा प्रणतायोचे सिद्धः शिष्याय सत्तमः । याभ्यां परं पुमान्याति स्वानन्दो वैष्णवं पदम् ।।८३।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे तीर्थयात्रोद्देशो नाम नवमोऽध्यायः ।।९।।**

**सप्ताहपारायणे द्वितीयः । अन्ते रसज्ञा वशा..स्तोत्रम् पठनीयम् । अन्यदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

इति उक्त्वा यात्राया प्रेरयामास। ते अपि ययुः। अहं तु तत्र एव सद्गुरु+पद+पद्म+अलिः अभवम्।८१। यदु+अर्जुनाभ्यां गुह्यौ वित्+योगौ प्राक् यथा प्राह तथा एष मे प्राह। (हे) विनीत शिष्य ते कथयामि।८२। इति उक्त्वा सत्तमः सिद्धः प्रणताय शिष्याय (तौ योगौ) ऊचे याभ्यां पुमान् स्वानन्दो परं वैष्णवं पदं याति।८३।

(शेवटचे दोन श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी क्षेपक म्हटलेले आहेत. त्याचे कारण असे दिसते की ह्यांचा विषय मूळ गुरुचरित्रांतला नाही. सिद्धमुनींनी नामधारकाला दिलेले हे आश्वासन आहे.) सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, 'ह्या दत्तप्रभूंनी यदु आणि कार्तवीर्यार्जुन यांना गूढ अशा ज्ञानमार्ग आणि योगमार्गांचा उपदेश पूर्वीच्या युगांत केला तसाच मलाही केला. हे शिष्योत्तमा, तूही नम्रतादि गुणांनी अधिकारी असल्याने ते मी तुला सांगत आहे'.८२. असे बोलून संतश्रेष्ठ सिद्धमुनींनी गीतेतील प्रतिपादनानुसार प्रणिपात, परिप्रश्न आणि सेवा यांचे अनुष्ठान करणाऱ्या शिष्याला - नामधारकाला, त्या दोन्ही योगांचे निरूपण केले, ज्यांयोगे पुरुष आनंदपूर्ण होऊन त्या परम वैष्णव पदाला पावतो.८३.

**तीर्थयात्रेचे महत्त्व -** *'उत्तमा सहजावस्था मध्यमा योगधारणा। अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाऽधमा।।'* अशी वर्गवारी शास्त्राने केलेली असली तरी महापाप्यांना मात्र प्रायश्चित्तादींच्या अनुष्ठानाने पापक्षय केल्याविना ज्ञान होऊ शकत नाही. 'आरशाचा पृष्ठभाग स्वच्छ केल्यावर त्यांत आपले प्रतिबिंब स्पष्ट दिसावे तसे पापकर्माच्या क्षयाने पुरुषाला

आत्मज्ञान होते; आपल्या चित्तांतच आत्म्याचे दर्शन होते.' (महाभारत, शांतिपर्व २०४:८) या स्मृतिवचनानुसार योग, याग इत्यादींचे अनुष्ठान करण्यास असमर्थ असणाऱ्या मुमुक्षूंना ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापाच्या क्षयासाठी, विवेकी लोकांसाठी कनिष्ठ गणल्या गेलेल्या तीर्थयात्रेचा उपदेश योग्यच आहे. पुरुषांसाठी विहित अशा संस्कारांनी संस्कृत झालेल्या शुद्धचित्तांतच आत्मज्ञान सहजच प्रकाशते. आत्मज्ञानाचा उदय झाल्यानंतर, त्या ब्रह्मानंदाचा रस लाभल्यावरच अभयावस्था लाभते (तैत्तिरीय उ. २:७). त्याला कुणाचीही भीती उरत नाही. पापपुण्य त्याला शिवू शकत नाहीत. अशी नैष्कर्म्यावस्था येते (तैत्तिरीय उ. २:९). त्यापूर्वी पूर्वसंचित पापकर्मांचा क्षय करून विद्येचा प्रादुर्भाव होण्यासाठीच कर्मांची आवश्यकता आहे. ही कर्मे बृहदारण्यकोपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे यज्ञ, दान, तप हीच होत. 'मग इथे तीर्थयात्रेचे निरूपण कसे केले?' अशा शंकेचे निराकरण स्वामिमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे. संसारसागरातून तारून नेणारी किंवा तरणोपाय असणारी ती तीर्थे अशा अर्थाने गंगादि ऋषिजुष्ट (ऋषींनी सेवन केलेल्या) जलांना तीर्थ असा शब्द रूढ झाला आहे. त्या जलांत स्नानादींनी कर्माच्या अनुष्ठानासारखाच पापक्षय होतो. यामुळेच ऋग्वेदांत (१:२३:२२-२३) तसेच तैत्तिरीय आरण्यकांत (१:१) जलदेवतांची प्रार्थना करणारे मंत्र आहेत. योगवासिष्ठांतही श्रीरामप्रभूंच्या तीर्थयात्रेचे वर्णन आलेले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा नववा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# दशमोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**शिष्यांस्तु तीर्थयात्रायै प्रेरयित्वा स्वयं कुह । उवास भगवान्ब्रूहि श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**संवत्सरं वैद्यनाथ-समीपमकरोद्विभुः । निवासमहमप्येतत्पादाब्जभ्रमरोऽभवम् ।।२।।**

**तत्रैत्यैको द्विजो मन्दो नमस्कृत्याब्रवीद्गुरुम् । प्रपद्ये भगवंस्त्वां मे मोक्षोपायमुपादिश ।।३।।**

नामधारक उवाच। शिष्यान् तार्थयात्रायै प्रेरयित्वा तु स्वयं भगवान् कुह उवास? (हे गुरो! मे) ब्रूहि। सादरं श्रोतुं इच्छामि।१। विभुः संवत्सरं वैद्यनाथसमीपं निवासं अकरोत्। अहं अपि तत्+पाद+अब्ज+भ्रमरः अभवम्।२। तत्र एकः मन्दः द्विजः गुरुं नमस्कृत्य अब्रवीत्। (भो) भगवन्! त्वां प्रपद्ये। मे मोक्ष+उपायं उपादिश।३।

श्रीगणेशाय नमः। **दहाव्यांत धौम्यगुरूंच्या शिष्यांची सांगुनी गोष्ट । पश्चात्तप्त द्विजाला करिती श्रीगुरु कृतार्थ ।।१।।** नामधारक विचारतो, सर्व शिष्यांना तीर्थयात्रेला पाठवून स्वतः भगवान कुठे बरे राहिले? मी आदरपूर्वक ऐकायला उत्सुक आहे; तरी आपण मला सांगा. या प्रश्नाच्या उत्तरांतून सिद्ध मुनी वेदांचे एक मर्म नामधारकाला सांगणार आहेत ते हे की गुरूंच्या मुखांतून श्रवण केलेली विद्याच उत्कृष्ट सिद्धीची प्राप्ती करून देते.१. 'प्रभूंनी परळी येथे वैद्यनाथांच्या निकट एक वर्ष वास्तव्य केले. मीसुद्धां त्यांच्या पदकमलांचा भ्रमर होऊन त्यांच्या सान्निध्याचा लाभ घेत होतो.२. तिथे असतांना एक मंदबुद्धी ब्राह्मण श्रीगुरूंना अभिवादन करून म्हणाला, 'हे प्रभो! मी आपल्याला शरण आलो आहे. तरी आपण मला मोक्षमार्गाचा उपदेश करावा.'३.

**मया तु सिद्धये कष्टं भूर्यकारि तथापि मे । नाप्ता सिद्धिर्नोपलब्धः सन्मार्गप्रापको गुरुः ।।४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कथं गुरुं विना वत्स सिद्धये केन योजितः । कस्याज्ञया कृतं कष्टमित्याकर्ण्य द्विजोऽब्रवीत् ।।५।।**

**सिद्ध्यै मया गुरुः कश्चिच्छ्रितश्चण्डः स तु प्रभो । सेवार्थी पीडयामास ततस्त्यक्तः स वै मया ।।६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**हन्तासाधु कृतं धिक्त्वां गच्छेतः सत्वरं यतः । गुरुद्रोह्यास्यावलोको न भद्राय कथंचन ।।७।।**

मया तु सिद्धये भूरि कष्टं अकारि। तथपि मे सिद्धिं न आप्ता। सन्+मार्ग+प्रापकः गुरुः न उपलब्धः।४। श्रीगुरुः उवाच। (हे) वत्स, गुरुं विना केन कथं सिद्धये योजितः? कस्य आज्ञया कष्टं कृतम्? इति आकर्ण्य द्विजः अब्रवीत्।५। मया सिद्ध्यै कश्चित् गुरुः श्रितः। (हे) प्रभो, स तु चण्डः, सेवार्थी, मां पीडयामास। ततः स मया त्यक्तः वै।६। हन्त! असाधु कृतम्। त्वां धिक्। इतः सत्वरं गच्छ, यतः गुरु+द्रोह्यस्य अवलोकः कथंचन भद्राय न।७।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, गुरूवीण कुणी, कशा प्रकारे मोक्षमार्गाला प्रवृत्त केले? आणि तू खूप कष्ट घेतले असे म्हणतोस ते कुणाच्या आज्ञेने? हे प्रश्न ऐकून तो ब्राह्मण सांगूं लागला.४. 'मी सिद्धीसाठी जपतपादि खूप कष्ट केले. तरीही मला ना सिद्धी मिळाली न परमार्थमार्गावर नेणारा गुरू मिळाला! मी मोक्षासाठी एका गुरूचा आश्रय केला होता. परंतु तो अति कोपिष्ट आणि केवळ सेवेची अपेक्षाच करणारा होता. त्याने माझा खूपच छळ केल्यामुळे मी त्याचा त्याग केला.'६. 'अरेरे! तू हे निंदनीय कृत्य केलेले आहेस. आपले दोन्ही कान ब्रह्माच्या यथार्थ निरूपणाने भरून टाकणारा गुरु आपल्या आईवडिलांसारखा असतो. त्याचा कधीही द्रोह करूं नये, असे मनूचे वचन आहे (मनुस्मृति २:१४४). तूं इथून ताबडतोब चालता हो! गुरुद्रोह्याचे तोंड पाहणाऱ्याचे कधीही भले होत नाही! मग त्याच्याशी संभाषणादि करणे तर दूरच.'७.

**प्रणिपातपरिप्रश्न-सेवाधर्मपराङ्मुखे । कुतो गुरुकृपालेशस्तद्वत्येव प्रसन्नता ॥८॥**

**॥ द्विज उवाच ॥**

**कथं ज्ञेयः कथं सेव्यो गुरुस्तन्मे वदाखिलम् । अजानता गुरुद्रोहः कृतोऽतो मोद्धर प्रभो ॥९॥**

प्रणिपात+परिप्रश्न+सेवा+धर्म+पराङ्मुखे कुतो गुरुकृपालेशः? तद्वति एव प्रसन्नता।८। द्विज उवाच। गुरुः कथं ज्ञेयः, कथं सेव्यः तत् अखिलं मे वद। अजानता गुरुद्रोहः कृतः। अतो मां उद्धर।९।

**गुरूच्या त्यागाचा निषेध -** मनुस्मृतीत (५७:७) असेही सांगितले आहे की, कार्याकार्याचा विचार न करतां उन्मार्गगामी दोषलिप्त गुरूचाही त्याग करावा. मग छळवादी गुरूचा त्याग केल्याबद्दल त्या ब्राह्मणाला कां निघून जायला सांगितले? या शंकेचे निरसन करण्यासाठी पुढचा श्लोक सांगितला आहे. मनूच्या वचनांत गुरूचाही (*गुरोरपि*) असा शब्दप्रयोग आहे. त्याचा अर्थ असा होतो की दोषत्रयांनी लिप्त असा गुरूसुद्धां त्याज्य किंवा दंड्य आहे. मग इतरांची काय कथा? ह्याने इतरांच्या त्यागाला बळकटी दिलेली आहे. गुरूच्या त्यागाचे समर्थन केलेले नाही. 'प्रसंगी मातृगमन करावे पण गंगेच्या कांठी दान घेऊ नये; पुत्राचे मांस खाल्ले तरी चालेल पण राजाकडून दान घेऊं नये,' इत्यादि वचने मातृगमनाचे किवा पुत्रमांसभक्षणाचे समर्थन करणारी नाहीत तर गंगाप्रतिग्रहाचा आणि राजप्रतिग्रहाचा निषेध करणारी आहेत. अशा वचनांना चोदना मानल्या तर अनर्थ होईल आणि *'चोदनालक्षणो धर्मः'* (मीमांसादर्शन १:१:२) ह्या सूत्राचा विपर्यास होईल. दोषलिप्तही गुरूचा त्याग कधीही समर्थनीय ठरणार नाही; मग उपकारकर्त्या गुरूचा कसा ठरेल? शिवाय इथे तर त्या ब्राह्मणाने सेवेलाच पीडा मानून आळसापोटी गुरूला सोडून दिले आहे. 'शिष्याची योग्यता येण्यासाठी प्रणिपात, परिप्रश्न, सेवा ह्या धर्मांचे पालन करायला हवे. तो गुरू दोषत्रयलिप्त नसतांना त्याचा त्याग केला आहे. तेव्हां अशाचे तोंड पाहूं नये' हे श्रीगुरूंचे म्हणणे योग्यच आहे.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गुरुर्निरुपमः साक्षाद् ब्रह्मविष्णुशिवात्मकः । सोऽज्ञेयस्त्वादृशैरन्धैस्तद्वत्सेवापि सद्गुरोः ।।१०।।**
**एतदर्थं पुरा वृत्तं शृणु धौम्याभिधो मुनिः । द्वापरेऽभूत् त्रयश्छात्रा आसन्तस्याङ्ग तत्पराः ।।११।।**

श्रीगुरुः उवाच। गुरुः निरुपमः। साक्षात् ब्रह्म+विष्णु+शिव+आत्मकः। सः त्वादृशैः अन्धैः अज्ञेयः। तद्वत् सद्गुरोः सेवा अपि (अज्ञेया)।१०। एतत् अर्थं पुरा वृत्तं शृणु। द्वापरे धौम्य+अभिधः मुनिः अभूत्। (हे) अङ्ग, तस्य त्रयः तत्पराः छात्राः आसन्।११।

वरील शिष्यधर्माचे पालन करणाऱ्यालाच गुरूची प्रसन्नता लाभते.८. श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्याचे मनन केल्यावर त्या ब्राह्मणाला स्वतःच्या अपराधाची जाणीव झाली. त्याचे परिमार्जन करण्यासाठी गुरूंना कसे ओळखावे आणि त्यांची सेवा कशा प्रकारे करावी ते तो श्रीगुरूंना विचारीत आहे. श्रीगुरूंविषयीच्या अज्ञानापोटी माझ्याकडून गुरुद्रोह झालेला आहे. तरी हे प्रभो, मला या पापांतून वर काढा.९. यावर श्रीगुरू म्हणाले, 'गुरूंना कशाचीही उपमा देतां येत नाही. ते साक्षात् ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांचे स्वरूप आहेत. तुझ्यासारख्या आंधळ्यांना सद्गुरूंचे किंवा त्यांच्या सेवेचे ज्ञान होऊं शकत नाही.' भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांनी शतश्लोकींत (१) सद्गुरूंचे निरुपमत्व असे प्रतिपादले आहे. आत्मज्ञानाचे दान देणाऱ्या सद्गुरूंना त्रिभुवनांतही दृष्टांत सांपडत नाही. परीसाची उपमा द्यावी तो तो परीस लोखंडाचे सोने करतो, पण त्याला परीसत्व देत नाही. पण सद्गुरू मात्र आपल्या चरणांच्या आश्रयाला आलेल्या शिष्याला आपले साम्यच बहाल करतो. या कारणाने गुरू निरुपम आणि अलौकिक आहेत.' साहजिकच ते ब्रह्मा-विष्णू-शिवस्वरूप ठरतात.१०. याविषयींचा एक इतिहास ऐक. द्वापरयुगांत धौम्य नांवाचा एक मुनि होते. त्यांचे तीन शिष्य होते. ते सेवाधर्माचे ज्ञाते असल्याने गुरुसेवेला तत्पर होते.११.

**बैदारुणोपमन्य्वाख्याः सेवाधर्मसुशिक्षिताः । तेषां परीक्षितुं भावं गुरुः प्राह दयार्द्रधीः ॥१२॥**
**मच्छालेयेऽम्ब्वभावोऽस्ति जीवेत्सस्यमतः कुतः । गत्वा वः कोपि यत्नेन क्षेत्रमम्ब्वानयत्वरम् ॥१३॥**
**श्रुत्वैवमरुणोऽह्नाय गत्वा क्षेत्रसमीपतः । जलमानीय यत्नेन पल्वलात्क्षेत्रमुन्नतम् ॥१४॥**
**दृष्ट्वाऽकरोत्क्षेत्रतुल्यं वारिवारणमाशु तत् । जलप्रवाहः सहसा क्षेत्रादन्यत्र निर्ययौ ॥१५॥**
**न्यस्तोऽपि पाषाणचयः स्थातुं तत्र शशाक नो । मन्ये क्षेत्रे जलाभावाद् गुरुर्मां धिक्करिष्यति ॥१६॥**
**गुर्वर्थमत्र मर्तव्यमिति मत्वोभयत्र सः । स्वाङ्गं निधायोपरिष्टाज्जलैः क्षेत्रमपूरयत् ॥१७॥**

बैद+आरुणि+उपमन्यु+आख्याः सेवा+धर्म+सुशिक्षिताः। तेषां भावं परीक्षितुं दयार्द्रधीः गुरुः प्राह।१२। मत्+शालेये अम्बु+अभावः अस्ति। अतः सस्यः कुतः जीवेत्? वः कः अपि गत्वा यत्नेन क्षेत्रं अम्बु अरं आनयतु।१३। एवं श्रुत्वा अरुणः अह्नः क्षेत्रसमीपतः गत्वा पल्वलात् यत्नेन जलं आनीय, पल्वलात् क्षेत्रं उन्नतं दृष्ट्वा आशु क्षेत्रतुल्यं वारिवारणं अकरोत्। तत् जलप्रवाहः सहसा क्षेत्रात् अन्यत्र निर्ययौ।१५। तत्र न्यस्तः पाषाणचयः अपि स्थातुं न शशाक। (सः) मन्ये क्षेत्रे जल+अभावात् गुरुः मां धिक् करिष्यति।१६। अत्र गुरु+अर्थम् मर्तव्यं इति मत्वा सः उभयतः स्वांगं निधाय उपरिष्टात् जलैः क्षेत्रं अपूरयत्।१७।

त्यांची नांवे बैद, आरुणी आणि उपमन्यु अशी होती. त्यांच्या गुरुभक्तीची परीक्षा करण्यासाठी ते दयाळु गुरू त्यांना म्हणाले.१३. 'माझ्या भातशेतीला पाण्याचा तुटवडा आहे; ते पीक कसे तग धरील? तुम्ही कुणी तरी जाऊन प्रयत्नपूर्वक शेतीला लवकर पाणी पुरवा.'१४. धौम्यमुनींची ही आज्ञा ऐकून आरुणी लगेच शेतीकडे गेला. त्याने तलावांतील पाणी कालवा काढून प्रयत्नपूर्वक शेतीजवळ आणले. पण तळ्यापेक्षा शेती उंच असल्याने पाणी अडवून शेतीच्या वर चढविले. तरीही शेतीतून ते पाणी खाली वाहून गेले.१५. आरुणीने तिथे रचलेले दगडही वाहून गेले. त्याला असे वाटले की शेतीमध्ये पाणी आणले नाही तर गुरू माझा धिक्कार करतील.१६. इथे गुरूंच्या कार्यासाठी मरण आले तरी बेहत्तर असा विचार करून त्याने शेतीच्या बाहेर जाणारा पाण्याचा मार्ग आपल्या शरीरानेच अडविला आणि अशा रीतीने शेत पाण्याने भरून टाकले.१७.

**धौम्योऽपि क्षेत्रमेत्याम्बु-पूर्णं शालेयमीक्ष्य सः । खिन्नः शिष्यमदृष्ट्वैहि वत्सेत्यावाहयन्मुदा ।।१८।।**
**प्रत्युत्तरं जलाक्तान्त-रङ्गो दातुं स न क्षमः । किञ्चिद्ध्वनिं चकारासौ तच्छ्रुत्वैत्य ददर्श तम् ।।१९।।**
**कृपया परयोत्थाप्य भक्तिं ज्ञात्वा स तत्क्षणम । तस्मिन्प्रसन्नः सम्भूय स्वीयं साम्यं व्यधान्मुनिः ।।२०।।**
**विद्याविनयसंपन्नो भूत्वा संतोष्य सद्गुरुम् । तदाज्ञया ययौ धाम स्वमर्च्योऽभवदत्र सः ।।२१।।**
**ततो बैदं गुरुः प्राह सस्यं मे शिष्य सर्वतः । रक्षयित्वानु धान्यं तद्यत्नात्सर्वं समानय ।।२२।।**

धौम्यः अपि क्षेत्रं एत्य शालेयं अम्बु+पूर्णं ईक्ष्य सः शिष्यं अदृष्ट्वा खिन्नः वत्स, एहि, इति मुदा आह्वयत्।१८। परया कृपया (तं) उत्थाप्य (तस्य) भक्तिं ज्ञात्वा सः (गुरुः) मुनिः तस्मिन् प्रसन्नः सम्भूय तत् क्षणं स्वीयं साम्यं व्यधात्।१९। सः (शिष्यः) जलाक्त+अंतरंगः प्रत्युत्तरं दातुं न क्षमः। असौ किञ्चित् ध्वनिं चकार। तत् श्रुत्वा एत्य तं ददर्श।२०। (सः) विद्याविनयसंपन्नो भूत्वा सद्गुरुं संतोष्य तत्+आज्ञया स्वं धाम ययौ। अत्र सः अर्च्यः अभवत्।२१। ततः गुरुः बैदं प्राह, (हे) शिष्य, मे सस्यं सर्वतः रक्षयित्वा अनु तत् सर्वं धान्यं यत्नात् समानय।२२।

इतक्यांत धौम्यमुनीही शेतावर आले आणि रानांत पाणी भरलेले पाहून आनंदित झाले. पण शिष्य कुठे दिसत नाही असे पाहून खिन्नही झाले आणि बाळा, इकडे ये, अशा हांका मारूं लागले.१८. पाण्यांत बुडलेला असल्याने शिष्य त्यांच्या हांकेला प्रतिसाद देऊं शकला नाही. त्याने थोडासा आवाज केला. तो ऐकून गुरू तिथे आले आणि त्यांनी आपल्या शिष्याची अवस्था पाहिली.१९. त्याला तसे पाहून धौम्यमुनींच्या मनांत अत्यंत करुणा उपजली आणि आरुणीची भक्ती त्यांनी जाणली. ते त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला तात्काळ आपल्यासारखे केले.२०. अशा रीतीने विद्या आणि विनय यांनी संपन्न होऊन तसेच त्यांना दक्षिणादानाने संतुष्ट करून, सोडमुंज करून आपल्या घरी गेला. सद्गुरूंच्या प्रसादाने विद्वत्ता प्राप्त करून या लोकांत तो पूज्य झाला.२१. नंतर धौम्यगुरूंनी बैद नांवाच्या दुसऱ्या शिष्याला बोलावून सांगितले, 'बा शिष्या, माझ्या शेतांतील पिकाची चांगली राखण करून मग खळे करून वेगळे केलेले सर्व धान्य प्रयत्नपूर्वक व्यवस्थित घेऊन ये.' **सस्य** म्हणजे शेतांतील कणीस इत्यादि पीक; **धान्य** म्हणजे साळी इत्यादि कोंड्यासह असलेले; **तण्डुल** म्हणजे सडलेले तांदूळ; **अन्न** म्हणजे शिजवलेला भात.२२.

**आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा पशुपक्षिनिवारणैः । सस्यं ररक्ष पश्चात्तच्छित्वा धान्यं स निर्ममे ॥२३॥**
**शशंस गुरवे न्यस्तो धान्यराशिर्मया गुरो । क्षेत्रेऽत्रानेतुमेकं मे शकटं देहि सर्षभम् ॥२४॥**
**तच्छ्रुत्वा शकटं तस्मै स लुलायेन योजितम् । प्रददौ स तमादाय नीत्वा विन्यस्य चाखिलान् ॥२५॥**
**शालीनाहरदर्धाध्वं तत्र पङ्के सकासरः । संलग्नोऽभूत्स्वयं सोऽथ स्वकण्ठेऽयोजयद्युगम् ॥२६॥**
**सलुलायः स शिष्यस्तु तत्र भारातिरेकतः । पपात तत्र सहसा धौम्यः प्राप यदृच्छया ॥२७॥**

आज्ञा प्रमाणम् इति उक्त्वा सः पशु+पक्षि+निवारणैः सस्यं ररक्ष, पश्चात् तत् छित्त्वा धान्यं निर्ममे।२३। गुरवे शशंस, '(हे) गुरो, मया क्षेत्रे धान्य+राशिः न्यस्तः। अत्र आनेतुं मे एकं सः+ऋषभंर शकटं देहि।'२४। तत् श्रुत्वा सः तस्मै लुलायेन योजितं शकटं प्रददौ। स तं आदाय नीत्वा अखिलान् शालीन् विन्यस्य आहरत्।२५। तत्र अर्ध+अध्वं सकासरः (शकटः) पङ्के संलग्नः अभूत्। अथ सः स्वयं स्वकंठे युगं अयोजयत्।२६। सः शिष्यः तु तत्र भारातिरेकतः सलुलायः पपात। तत्र धौम्यः यदृच्छया सहसा प्राप।२७।

'आपली आज्ञा प्रमाण आहे,' असे म्हणून ती मस्तकी धारण करून, बैदाने पशू, पक्षी इत्यादिकांपासून त्या धान्याची राखण करून योग्य वेळी त्या पिकातील धान्य खळे करून धान्य बाजूला केले.२३. मग त्यांनी गुरूंना जाऊन सांगितले, 'गुरुमहाराज, मी शेतांत धान्याची रास लावली आहे. ते इथे घरी आणायला मला मला एक बैल जोडलेली गाडी पाहिजे.'२४. ते ऐकून गुरूंनी त्याला एक रेडा जोडलेला गाडा दिला. बैद तो गाडा घेऊन शेताला आला आणि त्याने सगळ्या साळी त्याने त्यांत भरल्या.२५. तो गाडा घेऊन येतांना अर्ध्या वाटेत तो रेड्यासकट चिखलांत रुतला. तेव्हां शिष्याने स्वतःलाच त्या गाड्याच्या जुवाला जुपून घेतले.२६. रेड्यासह स्वतः गाडा ओढत असतां तो शिष्य ओझे फार झाल्याने पडला. एवढ्यांत धौम्य ऋषि फिरत फिरत तिथे आले.२७.

**तत्कर्म प्रेक्ष्य घोरं तं मोचयित्वा प्रसन्नधीः । वरं तस्मै ददौ येन स परत्रात्र चोत्तमः ।।२८।।**
**अथोपमन्युमाहैष गाश्चारय सदेत्यथ । कतिकालं तदा चक्रे स्वल्पभुक्क्षुधितोऽभवत् ।।२९।।**
**वने विप्रालयान्प्रेक्ष्य स्वं पुपोषान्नयाच्ञया । पुष्टोऽसि कथमित्युक्तो गुरुणा तन्न्यवेदयत् ।।३०।।**
**तन्मे देहीति गुरुणा भाषितः स तथाकरोत् । स पश्चाद्याच्ञयारक्षत्स्वं तद्वेदापि वै मुनिः ।।३१।।**
**द्विवारमर्पयेत्यूचे सच्छिष्योऽपि तथाकरोत् । पीत्वा ररक्ष गा दुग्धं वत्सपीतावशेषकम् ।।३२।।**

तत् घोरं कर्म प्रेक्ष्य, तं मोचयित्वा प्रसन्न+धीः तस्मै वरं ददौ, येन सः परत्र अत्र च उत्तमः (बभूव)।२८। अथ एष उपमन्युं आह, 'सदा गाः चारय', इति। अथ कतिकालं स्वल्प+भुक् तथा चक्रे। क्षुधितो अभवत्।२९। वने विप्र+आलयान् प्रेक्ष्य स्वं अन्न+याच्ञया पुपोष। गुरुणा कथं पुष्टः असि? इति उक्त्वा तत् न्यवेदयत्।३०। गुरुणा तत् मे देही इति भाषितः सः तथा अकरोत्। स पश्चात् याच्ञया स्वं अरक्षत्। मुनिः तत् अपि वै वेद।३१। 'द्विवारं अर्पय', इति ऊचे। सत्+शिष्यः अपि तथा अकरोत। वत्स+पीत+अवशेषकं दुग्धं पीत्वा गाः ररक्ष।३२।

आपल्या शिष्याने जिवावर उदार होऊन केलेले ते गाडा ओढण्याचे भयंकर कर्म पाहून गुरूंनी त्याला जुवांपासून मोकळे केले. त्याच्या ह्या सेवाभावाने प्रसन्न झालेल्या धौम्य मुनींनी त्याला असा वर दिला जेणेकरून तो इहलोकांत विद्यादींच्या प्राप्तीने आणि परलोकांत दिव्य भोगांनी श्रेष्ठ गती पावला.२८. मग ह्या गुरूंनी उपमन्यूला, 'तूं गाई चारत जा', असे सांगितले. सकाळी लवकरच अल्पच आहार घेऊन तो गाई चारायला जाऊं लागला. पण त्याला भुकेने व्याकुळ केले.२९. रानांत ब्राह्मणाची घरे पाहून त्यांच्याकडे माधुकरी मागून तो आपले पोट भरू लागला. गुरूंनी त्याला विचारले, '(घरी अन्न पुरेसे मिळत नसतांही) तूं कसा धष्टपुष्ट दिसतोस?' तेव्हां त्याने त्यांना सर्व सांगितले.३०. गुरूंनी, 'ते माधुकरीचे अन्नही घरी आणून देत जा', असे सांगितल्यावरून तो तसे करूं लागला. मग तो पुन्हां एकदां माधुकरी मागून आपली भूक भागवूं लागला. तेसुद्धा गुरूंना कळलेच!३१. त्यांनी दुसरी भिक्षाही घरीच द्यायला सांगितली. त्या आज्ञाधारक शिष्याने बिनतक्रार तसेच केले. मग तो वासरांनी पिऊन सांडलेले गाईंचे दूध ओंजळीत घेऊन पिऊन गाई राखूं लागला.३२.

**तज्ज्ञात्वा धीभ्रंशभिया वारितो गुरुणा वने । अर्कक्षीरं दधौ पातुं तत्तस्याक्षणोः पपात ह ।।३३।।**
**स पपातान्धवद् गावो ययुर्गेहं गुरुस्तदा । अन्वेष्य तं तथा दृष्ट्वा तं प्राह स्तुहि रेऽश्विनौ ।।३४।।**
**सोऽश्विस्तवाद्दृष्टिमाप गुरुणा तदुपर्यपि । कृपा कृता तेन सोऽपि कृतकृत्योऽभवद्द्रुतम् ।।३५।।**
**तच्छिष्या अपि तत्तुल्या बभूवुः शृणु सादरम् । उद्दालकोऽस्य शिष्यः सन्सत्रेऽहीनदहद्बहून् ।।३६।।**

तत् ज्ञात्वा गुरुणा धी+भ्रंश+भिया वारितः। वने अर्कक्षीरं पातुं दधौ। तत् तस्य अक्षणोः पपात ह।३३। सः अन्धवत् पपात। गावः गेहं ययुः। तदा गुरुः तं अन्वेक्ष्य तथा दृष्ट्वा प्राह, 'रे, अश्विनौ स्तुहि।'३४। सः अश्वि+स्तवात् दृष्टिं आप। तत् उपरि अपि गुरुणा कृपा कृता। तेन सः अपि द्रुतं कृतकृत्यः अभवत्।३५। तत्+शिष्याः अपि तत्+तुल्या बभूव। सादरं शृणु। उद्दालकः अस्य शिष्यः सन्। सत्रे बहून् अहीन् अदहत्।३६।

ते गुरूंना समजल्यावर त्यांनी उष्टे दूध प्याल्याने बुद्धीवर दुष्परिणाम होईल म्हणून त्याला मनाई केली. तेव्हां तो एकदां वनांत गाई चारायला जात असतां एका तुटलेल्या रुईच्या झाडांतून गळणारा चीक त्याने पाहिला. तेव्हां 'हे कांही उष्टे नाही' असा विचार करून पिण्यासाठी ओंजळीत घेतले. पण ते पीत असतांना चुकून त्याच्या डोळ्यांत गेले.३३. त्यामुळे त्याची दृष्टी जाऊन तो आंधळ्यासारखा तिथे एका खड्ड्यात पडला. गाई घरी गेल्या. तेव्हां उपमन्यू कां आला नाही याचा शोध घेत, त्याच्या कण्हण्याच्या आवाजाच्या अनुरोधाने गुरू तिथे आले. त्यांनी त्याची ती अवस्था पाहून त्याला अश्विनीकुमारांची स्तुती त्यांच्या मंत्राद्वारा करायला सांगितली.३४. त्याप्रमाणे उपमन्यूने अश्विनीकुमारांचे स्तवन केले आणि त्याची दृष्टी परत आली. पूर्वीच्या दोन शिष्यांप्रमाणे त्याच्यावरही गुरूंनी कृपा केली आणि तोसुद्धां कृतकृत्य झाला.३५. त्याचे - उपमन्यूचे शिष्यही त्याच्यासारखेच श्रेष्ठ झाले. उद्दालक नांवाच्या त्याच्या शिष्याने जनमेजयाने केलेल्या सर्पसत्रांत असंख्य सर्पांची आहुती दिली.३६.

**जनमेजयतोषार्थं स्वर्गाच्छक्रं समानयत् । अयं गुरुप्रसादस्तत्-तोषात्प्राप्यो न चान्यथा ।।३७।।**
**अतस्तमेव शरणं सर्वभावेन गच्छ भोः । तत्प्रसादात्परां शान्तिं मोक्षं प्राप्स्यसि दुर्लभम् ।।३८।।**

**।। विप्र उवाच ।।**

**युज्यते भिन्नधात्वैक्यं न मुक्तायास्तथा हृदः । तद्धृद्भिन्नं न यास्येऽतः प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ।।३९।।**
**इति तन्निश्चयं ज्ञात्वा के विन्यस्य करं गुरुः । तापदग्धाशुभस्यास्य प्राहाङ्ग स्वगुरुं स्मर ।।४०।।**

जनमेजय+तोषार्थं स्वर्गात् शक्रं समानयत्। अयं गुरु+प्रसादः तत्+तोषात् प्राप्यः। न च अन्यथा।३७। भोः, अतः तं एव सर्व+भावेन शरणं गच्छ। तत्+प्रसादात् परां शांतिं (तथा) दुर्लभं मोक्षं प्राप्स्यसि।३८। विप्र उवाच। भिन्न+धातु+ऐक्यं युज्यते, न मुक्तायाः। तथा हृदः। तत् हृत् (मया) भिन्नम्। अतः न यास्ये। ते अग्रतः प्राणान् त्यक्ष्यामि।३९। इति तत्+निश्चयं ज्ञात्वा ताप+दग्ध+अशुभस्य अस्य के करं विन्यस्य प्राह, अङ्ग, स्वगुरुं स्मर।४०।

जनमेजयाच्या आदेशाने त्याने तक्षकाला आश्रय दिलेल्या इंद्रालाही स्वर्गांतून खाली आणले. हा गुरूंचा कृपाप्रसाद केवळ त्यांना प्रसन्न करूनच प्राप्त होतो. त्याला दुसरा कांहीही उपाय नाही. गुरुकृपेविण आपल्या बुद्धीच्या बळावर ते ज्ञान मिळवतां येत नाही. ही मति तर्काने मिळवतां येत नाही असे कठोपनिषदाचे (१:२:९) प्रतिपादन आहे.३७. 'अरे ब्राह्मणा, याकरितां तूं सर्वभावे तुझ्या गुरूंनाच शरण जा. गीतेच्या वचनानुसार (४:३९) त्यांच्याच ज्ञानरूपी प्रसादाने तुला परम शांतीचा तसेच दुर्लभ अशा मोक्षाचाही लाभ होईल.'३८. तो ब्राह्मण म्हणाला, 'प्रभो, सोन्याचांदीसारख्या धातूचे पात्र, अलंकार इत्यादी भंग पावले तर ते वितळवून जोडतां येतात. मोती मात्र फुटले तर जोडतां येत नाही. मनाचेही तसेच आहे. मी माझ्या गुरूंचे मन मोडले आहे. तरी मी आतां त्यांच्याकडे कोणत्या तोंडाने जाऊं? त्यापेक्षां मी माझ्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून इथेच आपल्यासमोरच प्राणत्याग करतो.'३९. हा त्याचा निर्धार पाहून पश्चात्तापाने त्याची पापे नष्ट झाल्याचे जाणून श्रीगुरूंनी त्याच्या शिरावर हात ठेवला आणि म्हणाले, 'बा ब्राह्मणा, आपल्या गुरूंचे स्मरण कर.'४०.

**द्विजोऽपि स्वगुरुं स्मृत्वा तत्स्वरूपमिव प्रभुम् । ददर्श श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टाव स मुदश्रुयुक् ।।४१।।**
**तमाह प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुस्त्वं यथाक्रमम् । लघु निस्तीर्य कर्मौघं परां संसिद्धिमाप्स्यसि ।।४२।।**
**त्वया व्यालोकि रूपं मे यत्तद्भक्त्या स्मरन्क्रियाः । मदर्थ इत्सदासक्तः कुर्वन्सिद्धिमुपैष्यसि ।।४३।।**
**इति द्विजं तं निजरूपदर्शनात् सुदुर्लभस्वात्मसुखान्वितं प्रभुः ।**
**विधाय चैकं द्विजपुत्रमागतं समुद्दधारच्छितजिह्वमप्यरम् ।।४४।।**
**(क्षेपकः) ये केचन श्रीगुरुमीशबुद्ध्या सन्तापदग्धैनस आव्रजन्ति ।**
**प्रच्छिद्य ते मोहसमूहमाशु स्वानन्दसौख्यं द्विजवत्प्रयान्ति ।।१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते गुरुभक्त्यनुशासनं नाम दशमोऽध्यायः ।।१०।।**

द्विजः अपि स्वगुरुं स्मृत्वा प्रभुं तत्+स्वरूपं इव ददर्श। सः प्रेम्णा मुत्+अश्रु+युक् श्रीगुरुं तुष्टाव।४१। तं प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुः प्राह। कर्म+ओघं यथा+क्रमं लघु निस्तीर्य परां संसिद्धिं आप्स्यसि।४२ यत् मे रूपं त्वया व्यालोकि तत् भक्त्या स्मरन् इत् सदा क्रियाः मत्+अर्थ असक्तः कुर्वन् सिद्धिं उप+एष्यसि।४३। इति प्रभुः तं द्विजं निज+रूप+दर्शनात् सु+दुः+लभ+स्व+आत्म+सुख+अन्वितं विधाय च एकं छित+जिह्वं द्विजपुत्रं आगतं अरं सं+उत्+दधार।४४। ये केचन सन्ताप+दग्ध+एनस श्रीगुरुं ईश+बुद्ध्या आव्रजन्ति, ते द्विजवत् मोह+समूहं आशु प्रच्छिद्य स्वानंद+सौख्यं प्रयान्ति।१।

त्या विप्राने आपल्या गुरूंचे स्मरण करतांच त्याला श्रीगुरू भगवानांच्या ठिकाणी त्यांचेच दर्शन झाले. त्याचा भक्तिभाव उचंबळून डोळे आनंदाश्रूंनी डबडबले आणि तो हात जोडून श्रीगुरूंचे स्तवन करूं लागला.४१.त्या विनम्र ब्राह्मणाला श्रीगुरू म्हणाले, 'तुझ्या प्रारब्धानुसार एकामागून एक येणाऱ्या सुखदुःखांचे भोग सादर भोगून लवकरच संपवशील आणि अंती मोक्षरूपी परमसिद्धी पावशील.' इथे प्रारब्धभोगांची अनिवार्यता आणि श्रीगुरु-ईशकृपेने त्यांचे सुसह्यत्व दाखविले आहे.४२. नारदपुराणांत (पूर्वार्ध ३१:६९-७०) म्हटले आहे की आपण केलेले शुभ तसेच अशुभ

कर्म भोगावेच लागते. न भोगतां कर्म अब्जावधी कल्पांतही घटणार नाही. मग अगणित जन्मातील संचित कर्म आणि सतत निर्माण होत असलेले क्रियमाण कर्म पाहतां हा कर्मांच्या ओघांतून लवकर कसे पार पडतां येईल? ह्या प्रश्नाचे उत्तर ह्या श्लोकांत दिले आहे. 'हे जे माझे स्वरूप तूं पाहिले आहेस त्याचे सतत भक्तिपूर्वक चिंतन करीत सर्व नित्य-नैमित्तिक कर्मे अनासक्त वृत्तीने माझ्या प्रीत्यर्थच करीत जा. जशी देवावर तशीच गुरूंवर भक्ती (श्वेताश्वतर उ. ६:२३) ठेव. अशा ह्या निष्काम कर्मयोगाच्या आचरणाने तुझे अंतःकरण शुद्ध होऊन त्यांत ज्ञानाचा प्रकाश पडेल आणि द्वैताचे स्फुरण मावळून तुला मुक्तीचा लाभ होईल.'४३. अशा प्रकारे त्या विप्राला आपल्या स्वरूपाच्या दर्शनाने अत्यंत दुर्लभ अशा प्रत्यगात्मा (स्व) आणि परमात्मा यांच्या अखंडैकरस सामरस्याने होणाऱ्या सुखाचा लाभ करून दिला आणि कृष्णातीरावर एका जीभ कापून आलेल्या ब्राह्मणपुत्राचा उद्धार केला.४४. (ह्या श्लोकांतील विषय मूळ गुरुचरित्रात असा आलेला नसल्याने त्याला क्षेपक म्हटले असावे.) जे कुणी पश्चात्तापाच्या आगीत आपली पापे जाळून श्रीगुरूंना परमेश्वरस्वरूप मानून शरण येतात ते सर्व मोहमायेचा तत्काळ भेद करून आत्मानंदाचे अधिकारी होतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा दहावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**क आगतश्छातजिह्वः कथं भगवतोद्धृतः । तत्कथामृतमास्वाद्य तृष्णा मेऽतीव वर्धते ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**करवीरे सुधीपुत्रो जातोऽज्ञस्तं जगुर्बुधाः । विपुच्छशृङ्गो गौस्त्वं गोभाग्यं नात्तं तृणं तु यत् ।।२।।**
**विद्यानिधिर्हर्त्रलभ्यः स शिष्यार्पित एधते । श्रेष्ठेष्वर्च्यं करोत्यूनं क्वाप्यस्वं च धनान्वितम् ।।३।।**

नामधारक उवाच। कः छात+जिह्वः आगतः ? भगवता कथं उद्धृतः ? तत् कथा+अमृतम् आस्वाद्य मे तृष्णा अतीव वर्धते।१। करवीरे सु+धी+पुत्रः अज्ञः जातः। तं बुधाः जगुः। त्वं वि+पुच्छ+शृंगः गौः। यत् तृणं न अत्तं तत् गो+भाग्यम्।२। विद्या हर्तृ+अलभ्यः निधिः। सः शिष्य+अर्पितः एधते। ऊनं श्रेष्ठेषु अर्च्यं करोति। क्व अपि च अस्वं धन+अन्वितं (करोति)।३।

**श्रीगणेशाय नमः।** *अकराव्यांत संत्रस्त ब्राह्मणाची। छिन्न जीभ सांधुनी साची। गंगानुजावर साउली कृपेची। करुनी पादुका स्थापिल्या।।१।।* सद्गुरूंचा आश्रय केल्यानेच अखंडतया एकरस होऊनच निर्गुण आत्मतत्त्वाची ओळख पटते हाच खरा सिद्धांत असला तरी मंदबुद्धी साधकांना सगुण परमात्म्याचीच उपासना इष्ट आहे. त्यासाठी भगवंताच्या गुणांचे वर्णन करावे. आत्मसाक्षात्कारानंतर स्त्री-पुत्रादि विषयांपासून मनाची सहजच उपरती होते. पण अनेक जन्मात केलेल्या विषयसेवनाने, त्या विषयांकडे असलेला ओढा सहसा कमी होत नाही. त्या विषयांची आसक्ती दूर करण्यासाठी ईश्वररूप अशा सद्गुरूंची सेवा केली पाहिजे हे मागच्या अध्यायांत सफल गुरुसेवेच्या उदाहरणाने स्पष्ट केले. त्याच्याच दृढीकरणासाठी आतां या अध्यायांत इतर देवतादिकांच्या उपासनेपेक्षा ईश्वराचेच सगुण रूप असलेल्या सद्गुरूंच्या उपासनेने ऐहिक आणि पारलौकिक लाभही अनायासेच होतात हे विशद करण्याला आरंभ करीत आहेत.

**सुखे स्त्रीवावनेऽम्बेव सखेव क्वापि तातवत् । हिते बोधे च गुरुवद्विद्या धिक्त्वामविद्य रे ।।४।।**

**इति निर्भर्त्सितस्त्रस्तो भिल्लवाटीं ययौ स तु । प्रायोपविष्टोऽनशन आनर्च भुवनेश्वरीम् ।।५।।**

सुखे स्त्री इव। अवने अम्बा इव। क्व अपि सखा इव। हिते तातवत्। बोधे च गुरुवत्। हे अविद्य त्वां धिक्।४। इति निर्भर्त्सितः त्रस्तः सः भिल्लवाटीं ययौ। प्रायोपविष्टः अनशनः भुवनेश्वरींआनर्च।५।

नामधारक प्रश्न करीत आहे. 'मागील अध्यायाच्या शेवटी आपण जीभ कापून घेतलेल्याही ब्राह्मणाचा उद्धार केला असे म्हटले. तो जीभ नसलेला कोण? भगवंतांनी त्याचा कसा उद्धार केला? त्या श्रीगुरूंचे कथामृत जितके प्राशन करावे तितकी त्याची गोडी वाढतच जाते. अशी ही अनुपम गुरुलीला मला कथन करावी.'१. सिद्ध मुनी सांगू लागले - श्रीक्षेत्र कोल्हापूर येथे एका ब्राह्मणाला दुर्दैवाने मंदबुद्धी मुलगा झाला. अभ्यासात त्याचे लक्षच लागत नसे. तेव्हां त्याचे शेजारचे व आप्त त्याला अभ्यासाकडे प्रवृत्त करण्यासाठी त्याला म्हणाले, केवळ आहार आणि विहारानेच तुष्ट रहाणारा असा तू केवळ शेपूट आणि शिंगे नसलेला पशूच आहेस. त्यांच्याप्रमाणे तूं गवत खात नाहीस हे त्यांचे सद्भाग्यच होय. (*'साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः। तृणं न खादन्नपि जीवमानः सद्भागधेयं परमं पशूनाम्।। नीतिशतकः १२'*)२. विद्या हा असा खजिना आहे जो चोराला गंवसत नाही; शिष्याला दिला तर कमी न होतां वाढतोच; अकिंचनालाही (ऊनं) श्रेष्ठांमध्ये पूज्य करतो; निर्धनालाही धनी बनवितो. (*'हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम्। कल्पान्तेष्वऽपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनं येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते।।'* नीतिशतकः १६)३. पत्नीप्रमाणे सुख देणारी, आईसारखी सांभाळणारी, देशाविदेशांत कुठेही मित्रासारखी, पित्याप्रमाणे हित करणारी आणि गुरूसारखी बोध देणारी विद्या तूं संपादली नाहीस. तुझा धिक्कार असो.४. अशा रीतीने त्यांच्या निंदेने आणि अपमानाने त्रासून तो भिलवडीला गेला. तिथे आमरण उपोषण करीत त्याने देवी भुवनेश्वरीची उपासना आरंभिली. ५.

**दत्वाऽलब्धप्रसादोऽस्यै जिह्वां छेत्तुं कमुद्यतः । स्वप्ने देव्याह तं दण्डी कृष्णातीरेऽस्ति तं भज ।।६।।**
**इति श्रुत्वा दुःखितोऽपि धृत्यागत्य स सद्गुरुम् । ननामाश्रूत्तगात्रस्तन्मूर्ध्न्यधाच्छ्रीगुरुः करम् ।।७।।**
**स्पर्शेऽयोऽपि यथा हेम हंसः काकोऽपि मानसे । यथा विद्वांस्तथाभूत्स सुजिह्वः स्पर्शनाद्विभोः ।।८।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्कं ध्यायन्त्यङ्घ्र्यब्जमस्य ये । अपैति तत्प्रसादाद्धी-जाड्याद्यं नात्र चित्रमित् ।।९।।**

जिह्वां छेत्तुं दत्वा अलब्धप्रसादः कं (छेत्तुं) उद्यतः। स्वप्ने तं देवी आह। कृष्णा+तीरे दण्डी अस्ति, तं भज।६। इति श्रुत्वा दुःखितः अपि धृत्या अश्रु+उत्त+गात्रः सः सद्गुरुं आगत्य ननाम। तत्+मूर्ध्नि श्रीगुरुः करं अधात्।७। यथा अयः अपि स्पर्शे हेमः, यथा काकः अपि मानसे हंसः तथा सः विभोः स्पर्शनात् सुजिह्वः विद्वान् अभूत्।८। ये अस्य वज्र+अंकुश+ध्वजा+अब्ज+अंकं अंघ्रि+अब्जं ध्यायन्ति तत्+प्रसादात् धी+जाड्यादि अपैति। न अत्र चित्रं इत्।९।

त्याने देवीला आपली जीभ कापून वाहिली तरी ती प्रसन्न झाली नाही. मग तो आपले डोकेच कापायला सिद्ध झाला. इतक्यांत त्याला दैवयोगाने झोप आली. स्वप्नांत त्याला देवीचे दर्शन झाले. ती त्याला म्हणाली, कृष्णेच्या पैलतीरावर एक संन्यासी आहेत. त्यांना तूं शरण जा म्हणजे तुझे काम होईल.६. हे ऐकून तो दुखाने व्याकुळ असूनही अश्रूंनी भिजलेल्या अंगाने धीर धरून सद्गुरूंकडे गेला आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. अशा त्या जीभतुटक्या ब्राह्मणाच्या मस्तकावर श्रीगुरूंनी आपला हात ठेवला.७. परीसाला लागतांच लोखंडाचेही जसे सोने व्हावे, मानस सरोवरांत कावळाही हंस व्हावा तसा भगवंतांच्या स्पर्शाबरोबर त्या ब्राह्मणाची जिह्वा चांगली झाली आणि तो विद्वानही झाला. जीभ चांगली झाली म्हणजे तुटलेली परत पुरती झाली एवढेच नव्हे तर ती उत्तम वक्तृत्वाने आणि सुमधुर आलापांनी संपन्न झाली. आत्मज्ञानाला योग्य अशा कार्यकारणांचा प्रादुर्भाव त्याच्यात झाला. तसेच त्याला व्यावहारिक आणि पारमार्थिक ज्ञानही प्राप्त झाले.८.

**गुर्वाज्ञया गृहं गत्वा सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । भगवांस्तत उत्थाय दक्षिणाभिमुखो ययौ ।।१०।।**
**कृष्णावेणीपञ्चनदी-संगमं सुमनोहरम् । अष्टतीर्थान्वितं पुण्यं दृष्ट्वा तस्थौ परे तटे ।।११।।**
**सरस्वती शिवा भद्रा कुम्भी भोगवतीत्यमूः । कृष्णावेण्योः संगतास्तत्संगमस्तूत्तमोत्तमः ।।१२।।**

द्विजः गुरु+आज्ञया गृहं गत्वा उभयीं सिद्धिं प्राप। भगवान् ततः उत्थाय दक्षिण+अभिमुखः ययौ।१०। कृष्णा+वेणी+पंचनदी+संगमं अष्ट+तीर्थ+अन्वितं पुण्यं सुमनोहरं दृष्ट्वा परे तटे तस्थौ।११। सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती इति अमूः कृष्णावेण्योः संगताः। तत् संगमः तु उत्तम+उत्तमः।१२।

श्रीगुरूंच्या स्पर्शमात्राने त्या ब्राह्मणाची वाचा आणि बुद्धी प्रगल्भ झाल्याचे नवल करण्याचे कारण नाही. ज्या श्रीगुरूंच्या वज्र, अंकुश, पताका आणि कमळ या चिह्नांनी अंकित चरणांचे चिंतन करणाऱ्यांच्या प्रसादानेही बुद्धीचे मांद्य आदींचा निरास होतो, प्रत्यक्ष त्यांचीच कृपा झाल्यावर तो झाला तर आश्चर्य काय?९. तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने आपल्या घरी गेला. तिथे गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून अनासक्त वृत्तीने, ईश्वराच्या प्रीतीकरिता आणि लोकसंग्रहासाठी नित्यनैमित्तिक कर्मे आचरून स्त्री, पुत्र, गृह, धन इत्यादि इह लोकांत उपभोगण्याची (ऐहिक) आणि निरतिशय ब्रह्मानंदरूप आमुष्मिकी अशा दोन्ही प्रकारच्या सिद्धी पावला. भगवान् श्रीगुरूंनी तिथून निघून दक्षिण दिशेकडे प्रस्थान केले.१०. पद्मपुराणांत (उत्तरखंड १११:१३) कृष्णा साक्षात् विष्णूचे रूप आहे तर वेणी ही भगवान शंकरांचे. ह्या दोन नद्यांच्या भेदरहित हरिहरांचे स्वरूप असणाऱ्या कृष्णावेणीचा पंचनद्यांसह झालेला अत्यंत मनोहर, पुण्यप्रद आणि आठ तीर्थांनी युक्त असा संगम पाहून त्याच्या पश्चिम तीरावर औदुंबराच्या तळवटी श्रीगुरूंनी वास केला. ह्यावर श्रीस्वामिमहाराजांनी एक मार्मिक आणि हृद्य रूपक केले आहे. 'अष्टप्रकृतींच्या जुळणीने झालेल्या देहांत चिच्छक्ती आणि जीवशक्ती यांच्या संगमांत म्हणजेच अतीव चित्ताकर्षक आज्ञा चक्राच्या पल्याड ब्रह्मरंध्रांत श्रीगुरू स्थिरावले.

**स्थलं कुरुपुराख्यं तत्कुरुक्षेत्राधिपुण्यदम् । साक्षात्प्रयागोऽयमग्रे काश्याः श्रेष्ठं महास्थलम् ।।१३।।**
**तत्रोदुम्बरकल्पद्रुर्विश्वेट्तुल्योऽमरेश्वरः । योगिन्योऽपि चतुःषष्टिर्नरोऽप्यत्रामरो भवेत् ।।१४।।**
**स्वर्याति ना तपःस्नायी संगतेऽत्र सितासिते । तीर्थान्यवाक्प्रवाहेऽत्र महाघघ्नानि कोटिशः ।।१५।।**

तत् कुरुपुर+आख्यं स्थलं कुरुक्षेत्र+अधि+पुण्यदम्। अग्रे साक्षात् प्रयागः अयं काश्याः श्रेष्ठं महास्थलम्।१३। अत्र सित+असिते संगते तपः+स्नायी ना स्वः याति। अत्र अवाक् प्रवाहे महा+अघ+घ्नानि कोटिशः तीर्थानि।१४। तत्र उदुम्बर+कल्पद्रुः, विश्वेट्+तुल्यः अमरेश्वरः, योगिन्यः अपि (वसन्ति)। अत्र नरः अपि अमरः भवेत्।१५।

तट या शब्दांत जगताच्या उत्पत्ती-स्थिती-लयादि तटस्थलक्षणांचा संकेत आहे.' अथवा **पर** म्हणजे सर्वोत्कृष्ट आणि **अतटे** अर्थात् निस्सीम सच्चिदानंदस्वरूपांत विसांवले असाही अर्थ करतां येईल.११. सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती ह्या पांच नद्या कृष्णा-वेणी यांना येऊन मिळतात तो संगम गङ्गा-यमुना इत्यादि उत्कृष्ट संगमांहूनही उत्तम आहे.१२. कुरुपुर नांवाचे हे क्षेत्र पद्मपुराणाने (स्वर्गखंड २७:९२) तिन्ही लोकांत विशेष मानले आहे. त्यानुसार कुरुक्षेत्राचे माहात्म्य भूलोकांतील सर्व तीर्थांच्या माहात्म्याइतकेच आहे. अशा कुरुक्षेत्राहून हा संगम अधिक पुण्यप्रद आहे. हा साक्षात् प्रयागच आहे. त्याच्यापुढे पूर्वेकडे युगालय (जुगुळ) हे काशीहून श्रेष्ठ महान क्षेत्र आहे.१३. ह्या धवल आणि कृष्ण प्रवाहांच्या संगमांत माघ महिन्यांत स्नान करणारे पुरुष (किंवा स्त्रिया) ऋग्वेदात (१०:७५:५) सांगितल्याप्रमाणे स्वर्गात जातात. दक्षिणाभिमुखी प्रवाहांत शुक्लतीर्थापासून संगमापर्यांत कोटिशः तीर्थे आहेत. छांदोग्य उपनिषदांत (५:१०:९) सांगितलेली सुवर्णचोरी, सुरापान, गुरुतल्प, ब्रह्महत्या आणि त्यांच्यांत सहभाग, ह्या पंचमहापापांचा नाश करणारी आहेत.१४. त्या श्रीगुरूंच्या निवासस्थानी असलेला औदुंबर हा कल्पवृक्षच आहे; पैलतीरावरचा अमरेश्वर हा विश्वेश्वरासमान आहे; तिथेच चौसष्ट योगिनींचाही वास आहे. अशा या पवित्र ठिकाणी राहणारे रागद्वेषादि असलेले मानवही शमदमादि दैवी संपदेने युक्त होतात.१५.

**मुमुक्ष्वाश्वासनं कामि-हितं सत्तमरञ्जनम् । दृष्ट्वाश्रमं मूर्तिमत्स्वं परात्मोदुम्बरे व्यधात् ।।१६।।**
**सद्विद्याढ्यामरपुरं प्राङ्निरीक्ष्यैत्य तत्र सः । स्वाचारं वैदिकं दीनं प्रभुर्भिक्षां स्म याचते ।।१७।।**
**भिक्षावृत्तेस्तदा साध्वी सात्त्विकस्य कुटुम्बिनी । अन्नाभावाद्ददौ शाकमातिथेयी तु भिक्षवे ।।१८।।**
**भक्त्यार्पितमपि प्राश्य शाकं संतृप्त ईश्वरः । तत्र शाकलतां दृष्ट्वा तामुत्पाट्याश्रमं ययौ ।।१९।।**
**तदा स्त्रीर्दुःखिता प्राह योगक्षेमकरी कुतः । उन्मूलिता लता नैव भिक्षाशाठ्यं मया कृतम् ।।२०।।**

मुमुक्षु+आश्वासनं, कामि+हितं, सत्+तम+रंजनं आश्रमं दृष्ट्वा परात्मा स्वं उदुम्बरे व्यधात्।१६। सत्+विद्या+आढ्य+अमरपुरं प्राक् निरीक्ष्य तत्र सः प्रभुः वैदिकं सु+आचारं दीनं भिक्षां याचते स्म।१७। तदा भिक्षा+वृत्तेः सात्त्विकस्य साध्वी कुटुम्बिनी भिक्षवे अन्न+अभावात् आतिथेयी शाकं ददौ।१८। भक्त्या अर्पितं शाकं अपि प्राश्य संतृप्तः ईश्वरः तत्र शाकलतां दृष्ट्वा तां उत्पाट्य आश्रमं ययौ।१९। तदा स्त्रीः दुःखिता प्राह, योग+क्षेम+करी लता कुतः उन्मूलिता? मया भिक्षा+शाठ्यं नैव कृतम्!२०।

मुमुक्षूंना आश्वासन देणारा, सकाम भक्तांचे इच्छापूर्तिरूप हित करणारा, संतसज्जनांना परमानंदाने रमविणारा तो आश्रम पाहून परमात्मरूप सद्गुरूंनी आपल्या स्वरूपाची तिथे विशेषत्वाने स्थापना केली.१६. सत् म्हणजे परा विद्या अभ्यासणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती असलेले अमरापूर पूर्वतीरावर पाहून तो मानवरूप भगवंत आचारसंपन्न, वैदिक आणि नम्र अशा एका ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागायला गेला.१७. तेव्हां यायावर वृत्तीने (भिक्षा मागूनच) निर्वाह करणाऱ्या त्या सात्त्विक ब्राह्मणाच्या साध्वी पत्नीने घरांत कांहीच अन्न नसल्याने त्या यतिवेषधारी श्रीगुरूंना (घेवड्याच्या शेंगांची) भाजी अतिथीला योग्य समजून वाढली.१८. भक्तीने अर्पण केलेली ती भाजी सेवन करूनच भगवंत तृप्त झाले. तिथून जातांना त्यांनी अंगणांत पसरलेला घेवड्याचा वेल उपटून टाकला आणि ते आपल्या आश्रमांत परतले.१९. तेव्हां ती ब्राह्मणी कळवळून आपल्या पतीला म्हणाली, 'अहो पहा तरी! त्या संन्याशाने आपला चरितार्थ चालविणारा घेवड्याचा वेल कसा उपटून टाकला! घरात खरेच कांही दुसरे नसल्याने मी त्यांना भाजी वाढली. त्यांना चाळविण्याचा माझा हेतू नव्हता.'२०.

**तां भर्तोचे मौनमेहि न कोऽपि सुखदुःखदः । लोकाः स्वकर्मसूत्रोता वृथाहङ्कारसंश्रिताः ।।२१।।**
**ईशाधीनं जगत्सर्वं येनाप्तव्यं तु यत्ततः । कोऽपि नेशोऽन्यथा कर्तुमायुश्चान्नं स यच्छति ।।२२।।**
**विश्वोद्भवलयत्राण-निदानस्यास्य चैकदृक । प्राज्ञेऽज्ञे राज्ञि रङ्केऽपि मा शुचस्तारकोऽस्त्ययम् ।।२३।।**

भर्ता तां ऊचे, मौनं एहि। न कः अपि सुख+दुःख+दः। लोकाः स्व+कर्म+सूत्र+उताः वृथा+अहंकार+संश्रिताः।२१। सर्वं जगत् ईशाधीनम्। येन यत् आप्तव्यं तत् अन्यथा कर्तुं तु कः अपि न ईशः। सः आयुः अन्नं च यच्छति।२२। विश्व+उद्भव+लय+त्राणस्य अस्य प्राज्ञे, अज्ञे, राज्ञि, रंके च अपि एक+दृक्। मा शुचः। अयम् तारकः अस्ति।२३।

पतीने तिला शांत राहायला सांगितले आणि म्हणाला, 'या जगांत कुणी कुणाला सुख वा दुःख देत नसते. आपल्या कर्माच्या धाग्यांत गुंतून सुख-दुःखांचा भोग घेणारे लोक कर्मपरतंत्र असूनही व्यर्थ मीपणा मिरवतात.' (*'सुखस्य दुःखस्य न कोपि दाता, परो ददातीति कुबुद्धिरेषा। अहं करोमीति वृथाभिमानः, स्वकर्मसूत्रे ग्रथितो हि लोकः।।' अध्यात्मरामायण* २:६:६) दुसऱ्याला बोल लावूं नये, त्यांचे दोष प्रकट करूं नयेत असा त्याचा अभिप्राय. 'वृद्ध मातापिता, साध्वी पत्नी, तान्हे मूल यांच्या पोषणासाठी शंभर दुष्कृत्येही करावी लागली तरी करावीत,' असे मनूचे (मनुस्मृति परिशिष्ट) सांगणे आहे. 'ते माझ्यासाठी असूनही मी दुःख करीत नाही. तूं तर पत्नी आहेस आणि तुझ्यावर कुणाच्याही पोषणाची जबाबदारी नाही. मग तूं का शोक करतेस?' पाप करणाऱ्याला जी गती तीच त्याचे पाप बोलून दाखविणाऱ्याची होते. यासाठी पत्नीला गप राहायला त्याने सांगितले.२१. 'हे सर्व जग ईश्वराधीन आहे. ज्याला जे कांही सुख वा दुःख मिळायचे असते तेच त्याला ब्रह्मसूत्रांच्या सिद्धांतानुसार परमात्माच (३:२:३८) देतो. त्यांत कुणीही बदल करूं शकत नाही. तोच आयु आणि अन्नही देतो.२२. सकल विश्वाचा जनक, पालक आणि संहारक अशा त्या परमेश्वराची शहाणा वा निर्बुद्ध, राजा वा रंक या सर्वांवर एकसारखीच कृपादृष्टी असते. तूं शोक करूं नकोस. (शोक म्हणजे आपल्याला हव्याशा वस्तू, माणसे इत्यादींच्या वियोगाने होणारा मनाचा संताप) हा प्रभूच तारणहार आहे.'२३.

**इत्याश्वास्य वधूं विप्रो मूलमुत्खाय तत्र सः । अर्थपूर्णं घटं लेभे सद्गुरोः संप्रसादतः ।।२४।।**
**सभार्योऽथ द्विजो गत्वा शशंस गुरवे तु तत् । स प्राह दम्पती गोप्यमिदं श्रीर्नान्यथा ध्रुवा ।।२५।।**
**ऐश्वर्यपुत्रपौत्राढ्यौ संभूयात्र निरामयौ । मोक्षं गमिष्यथो नूनं गन्तव्यं सुखमालयम् ।।२६।।**

इति वधूं आश्वास्य विप्रः मूलं उत्खाय तत्र सः सद्गुरोः संप्रसादतः अर्थपूर्णं घटं लेभे।२४। अथ द्विजः सभार्यः गुरवे गत्वा तत् तु शशंस। सः प्राह, (हे) दम्पती, इदं गोप्यम्। अन्यथा श्रीः न ध्रुवा।२५। अत्र ऐश्वर्य+पुत्र+पौत्र+आढ्यौ निरामयौ संभूय नूनं मोक्षं गमिष्यथः। सुखं आलयं गन्तव्यम्।२६।

अशी आपल्या बायकोची समजून काढून त्याने तोडलेल्या वेलीचे मूळ खोदून काढले. तिथे त्या सद्गुरूंच्या मंगल प्रसादाने द्रव्याने भरलेला घडा मिळाला. इथे अशी शंका उपस्थित होते की अर्थ म्हणजे धन हे अनर्थाचे मूळ आहे असे असतां तो सद्गुरूंचा मंगल प्रसाद कसा मानावा? अर्थ हा अनर्थ आहे खरा; पण तो विषयभोगांत आसक्त असणाऱ्यांना किंवा कवडीचुंबकांना. चित्त शुद्ध असणाऱ्या भगवद्भक्तांना तेच धन यज्ञादि सत्कर्मांनी दैवी संपत्तीच्या प्राप्तीचे साधन होतो. यासाठी तो श्रीगुरूंचा संप्रसाद म्हटलेला आहे.२४. मग तो ब्राह्मण आपल्या पत्नीसह श्रीगुरूंकडे गेला. त्याने आपल्याला धन प्राप्त झाल्याचे त्यांना सागितले. त्यावर ते म्हणाले, ‘तुम्ही उभयतांनी ही गोष्ट गुप्त ठेवावी. अन्यथा ही लक्ष्मी टिकणार नाही.२५. इथे भूलोकी पुत्र-पौत्रांसह ऐश्वर्य तसेच आरोग्य भोगून अंती निश्चितपणे मुक्ती पावाल.’ या वेळी त्या दंपतीने श्रीगुरूंच्या चरणांशीच राहून सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावर त्यांना ‘आतां सुखाने घरी जा,’ असे सांगून निरोप दिला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ते पती-पत्नी आपल्या घरी गेले आणि श्रीगुरूंच्या आशीर्वचनाप्रमाणेच ऐहिक भोग भोगून अंती मोक्ष पावले.२६.

**।। नामधारक उवाच ।।**

**भिक्षावृत्तिः प्रभोः कस्मात्कल्पद्रुम उदुंबरः । सति पूज्यतमेऽश्वत्थे कुतो भगवता श्रितः ।।२७।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**पक्वान्नभिक्षुको भिक्षुरिति श्रुतमतं प्रभुः । भिक्षुः सन्लीलया भेजे शम्भुवृत्तिरियं पुनः ।।२८।।**

नामधारक उवाच। 'प्रभोः भिक्षावृत्तिः कस्मात्? उदुंबरः कस्मात् कल्पद्रुमः? पूज्यतमे अश्वत्थे सति भगवता (उदुंबरः) कुतः श्रितः?'२७। प्रभुः लीलया भिक्षुः सन् भिक्षुः पक्वान्नभिक्षुकः इति श्रुतमतं भेजे। पुनः इयं शम्भु+वृत्तिः।२८।

ही कथा ऐकल्यावर नामधारकाने आपल्या मनांत उठलेले तीन प्रश्न सिद्धमुनींना विचारले आहेत. 'आपल्या भक्तांना सर्व ऐश्वर्याचे दान करणारे प्रभू भिक्षावृत्तीचा अवलंब कां करतात? औदुंबर वृक्षाला कल्पवृक्षाची योग्यता कशी आली? तसेच स्वतः भगवंतांनी आपली विभूती म्हणून गौरविलेला पिंपळ (भ.गीता ११:२६) सोडून उंबराचा आश्रय कां घेतला?'२७. **प्रभूंची भिक्षावृत्ती -** भगवंतांनी लीलेने यतिवेष घेतला असल्याने आणि संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी सिद्ध अन्नाची भिक्षा मागावी (पराशर स्मृति १:४६) अशा श्रवणाने झालेल्या मताचा अंगीकार केला. **श्रुतमत** म्हणजे बृहदारण्यक उपनिषदाचे आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी पुत्रैषणा, वित्तैषणा, लोकैषणा या तिन्हींचा परित्याग करून भिक्षेची वृत्ती अवलंब करावी हे मत (३:५:१) असाही होतो. याशिवाय शं म्हणजे सुख ते जिच्यापासून होते ती शंभू वृत्ती; अर्थात् सुखपर्यवसायी वृत्ती. *'भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः। भिक्षाहारी प्रकुरुते सोमपानं दिने दिने।।'* (भिक्षान्न सेवन करणारा हा निराहारी असतो. भिक्षा हा प्रतिग्रह मुळीच नाही. भिक्षेवर निर्वाह करणारा प्रतिदिन सोमपान करतो.) अशी स्मृति आहे. श्रीदासबोधांत समर्थ रामदासस्वामी म्हणतात, *'भिक्षा मागोन जो जेविला। तो निराहारी बोलिला। प्रतिग्रहावेगळा जाला। भिक्षा मागतां।।२।। संतासंत जे जन। तेथें कोरान्न मागोन करी भोजन। तेणें केलें अमृतप्राशन। प्रतिदिनीं।।३।।'* (१४:२).२८.

**नखा नृसिंहावतारे विषार्ता दैत्यदारणात् । शान्ता औदुम्बरैः सोऽथ प्रीत्यानेन सदाश्रितः ।।२९।।**
**यत्र क्वाप्येष कल्पद्रुर्भूयात्तापाघदैन्यहृत् । कामदोऽहं श्रियात्रासमिति तस्मै वरोऽर्पितः ।।३०।।**
**विश्वात्मा यत्र तत्रैव वेदतीर्थामरा अपि । सन्त्युदुम्बर एवात्र कल्पद्रुर्भुवि नापरः ।।३१।।**
**तस्मादुदुम्बरतले भिक्षां कुत्रापि विश्वभृत् । अकृत्वा कामरूपाभिर्योगिनीभिः स्थितोऽर्चितः ।।३२।।**
**अज्ञानावृतविप्रास्तदज्ञात्वोचुः परस्परम् । कथं जीवत्यकृत्वायं भिक्षां मृग्यं तदद्य हि ।।३३।।**

नृसिंह अवतारे नखा दैत्य+दारणात् विष+आर्ताः (अभूवन्)। औदुम्बरैः शांता (जाताः)। अथ सः अनेन प्रीत्या सदा आश्रितः।२९। यत्र क्व अपि एष कल्प+द्रुः पाप+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात्। कामदः अहं श्रिया अत्र आसम् इति वरः तस्मै अर्पितः।३०। यत्र विश्व+आत्मा तत्र एव वेद+तीर्थ+अमराः अपि सन्ति। अत्र भुवि उदुम्बर एव कल्प+द्रुः न अपरः।३१। तस्मात् विश्व+भृत् कुत्र अपि भिक्षां अकृत्वा काम+रूपाभिः योगिनीभिः अर्चितः उदुम्बर+तले स्थितः।३२। अज्ञान+आवृत+विप्राः तत् अज्ञात्वा परस्परं ऊचुः। अयं भिक्षां अकृत्वा कथं जीवति? तत् अद्य हि मृग्यम्।३३।

**औदुंबरमाहात्म्य -** आतां सिद्धमुनि दुसऱ्या - औदुम्बरसंबंधी प्रश्नाचे उत्तर देत आहेत. नरसिंह अवतारांत ह्या भगवंताची नखे हिरण्यकशिपूचे पोट फाडतांना त्यांतील दाहक विषाने भाजली. त्या वेळी लक्ष्मीमातेने आणलेल्या उंबराच्या फळांनी तो दाह शमून नखे शांत झाली. तेव्हांपासून औदुम्बर वृक्ष देवाला प्रिय झाला आणि ते सदा त्याच्याखाली राहूं लागले.२९. जेथे कुठे - वाडीत, खेड्यांत, क्षेत्रांत, हा कल्पवृक्ष असेल तिथे तो पाप, ताप, दैन्य यांचा हारक होईल. भक्तांच्या कामना पुरविणारा मीहि, लक्ष्मीसह तेथे वास करीन असा वर त्या वृक्षाला देवाने दिला. विश्वात्मा हरी जिथे राहतो त्या औदुम्बरांतच वेद, तीर्थे आणि देवांचाही वास आहेच. त्यामुळे ह्या पृथ्वीतलावर औदुम्बरच कल्पवृक्ष आहे. दुसरा कोणताही वृक्ष नाही.३१. त्यामुळे, किंवा अमरापुरांत घेवड्याच्या भाजीची भिक्षा केल्या दिवसापासून, विश्वंभर श्रीगुरू कुठेही भिक्षा न घेतां औदुंबराच्या तळवटीच इच्छेप्रमाणे रूप धारण करणाऱ्या चौसष्ट योगिनींची पूजा घेत राहिले.३२. त्या गांवच्या अज्ञानी ब्राह्मणांना हे न कळल्यामुळे ते परस्परांत बोलूं लागले, ‘हा संन्यासी भिक्षेवांचून कसा जगतो याचा आजच शोध घेऊं या!’३३.

**इत्थं विचार्य तस्थुस्ते मध्याह्ने योगिमायया । त्रस्ता ग्रामं ययुः कोऽपि ज्ञातुं शक्योऽस्य चेष्टितम् ।।३४।।**
**श्रीगुरुं द्रष्टुमागत्य भाविको भक्तिभावनम् । गङ्गानुजाख्यभक्तोऽत्र दृष्टवान् चित्रमेकदा ।।३५।।**
**जलपूर्णाऽपि कृष्णाऽदान्मार्गं तेनागमत्प्रभुः । ददर्शान्वेत्य भक्तोऽपि पुरीं दिव्यामिवान्तरे ।।३६।।**
**नीराजितो योगिनीभी रत्नसिंहासनस्थितः । स्वर्चितः प्रेक्ष्य तं देवः प्राह कोऽस्यागतः कुतः।।३७।।**

इत्थं विचार्य ते विलीय तस्थुः। मध्य+अह्ने योगि+मायया त्रस्ता ग्रामं ययुः। अस्य चेष्टितं कः अपि ज्ञातुं शक्यते?३४। एकदा गङ्गानुज+आख्यः भाविकः भक्तः भक्तिभावनं श्रीगुरुं द्रष्टुं आगत्य चित्रं दृष्टवान्।३५। जलपूर्णा अपि कृष्णा मार्गं अदात्। तेन प्रभुः आगमत्। अनु एत्य भक्तः अपि अंतरे दिव्यां इव पुरीं ददर्श।३६। रत्नसिंहासनस्थः स्वर्चितः योगिनीभिः नीराजितः देवः तं प्रेक्ष्य प्राह, 'कः असि? कुतः आगतः?'३७।

असा विचार करून ते ब्राह्मण श्रीगुरूंवर लक्ष ठेवून लपून बसले. पण दुपारच्या वेळी ईश्वराच्या मायेने भ्रमित होऊन घाबरून घरी गेले. ह्या भगवंताची लीला कधी कुणाला जाणतां आली आहे काय?३४. एकदां गंगानुज नांवाचा एक भाविक भक्त, भक्तिगम्य श्रीगुरूंच्या दर्शनासाठी आला असतां त्याने एक चमत्कार पाहिला.३५. कृष्णा नदी पाण्याने दुथडी भरलेली असूनही तिने श्रीगुरूंना वाट करून दिली आणि त्या मार्गाने प्रभू आत गेले. भक्तही त्यांच्या मागे गेला असतां त्याने नदीच्या आंत एक जणु बेट आहे आणि त्यावर एक अमरावतीसारखी दिव्य नगरी पाहिली.३६. तिथे चौसष्ट योगनींनी श्रीगुरूंना रत्नजडित सिंहासनावर बसवून त्यांची पूजा आणि आरती केलेली त्याने पाहिली. इतक्यांत श्रीगुरूंनी त्याला पाहिले आणि विचारले की, 'तूं कोण आहेस? आणि इथे कशासाठी आला आहेस?' ३७.

**।। गङ्गानुज उवाच ।।**

**गङ्गानुजाभिधोऽहं त्वामत्रत्यो द्रष्टुमन्वगाम् । भवान्परात्मा सर्वेशो दैवान्मेऽद्यात्र गोचरः ।।३८।।**
**त्वन्मायामोहितात्मानस् त्वां विदुः केवलं नरम् । संसारसागरेऽपारे तेऽतो मज्जन्ति नेतरे ।।३९।।**
**इति प्रेम्णा स्तुतस्तस्मै हृद्यं दत्वेश्वरोऽब्रवीत् । मयि सत्यत्र यद्दृष्टं नाख्येयं कस्यचित्त्वया ।।४०।।**

'अहं गङ्गानुज+अभिधः अत्रत्यः त्वां द्रष्टुं अनु अगाम्। भवान् परात्मा सर्वेशः मे अद्य अत्र दैवात् गोचरः (जातः)'।३८। 'त्वत्+माया+मोहित+आत्मानः (ये) त्वां केवलं नरं विदुः ते अपारे संसार+सागरे मज्जन्ति। न इतरे।'३९। इति प्रेम्णा स्तुतः ईश्वरः तस्मै हृद्यं दत्वा अब्रवीत्। 'त्वया यत् दृष्टं मयि अत्र सति न कस्यचित् आख्येयम्।'४०।

'माझे नांव गंगानुज असून मी याच गांवचा (औरवाडचा) राहणारा आहे. आपल्या दर्शनासाठी आपल्या मागे आलो. आपण साक्षात् परमात्मा आणि परमेश्वर आहांत. माझ्या पूर्वपुण्याईच्या परिपाकाने जागलेल्या अनन्य भक्तीमुळे मला आज या ठिकाणी आपले दर्शन झाले आहे.' गंगानुजाला असे दुर्लभ दर्शन होण्याचे कारण श्रीस्वामिमहाराज श्रीमद्भगवद्गीतेच्या (८:२२) आधारे देत आहेत. 'हे अर्जुना, तो परम पुरुष केवळ अनन्य भक्तीनेच पावतो.' (*'पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।'*)३८. 'तुझ्या मायेने ज्यांच्या मनाला मोह झालेला आहे त्यामुळे जे अज्ञानवश तुला केवळ मानव समजतात ते ह्या दुस्तर संसारसागराचा पार (ब्रह्म) न पावल्याने त्यांतच गटांगळ्या खातात. इतर तुझे स्वरूप जाणणारे तुझे भक्त मात्र संसारसागर तरून जातात.'३९. अशा प्रेमभराने केलेल्या स्तुतीने प्रसन्न होऊन श्रीगुरुस्वरूप ईश्वराने त्याला त्याचा अभीष्ट वर देऊन सांगितले की, 'तूं हे जे आज इथे पाहिलेस ते मी या ठिकाणी (ह्या रूपाने) असेपर्यंत कुणालाही सांगूं नकोस.' मी इथून गेल्यावर मात्र सांगायला हरकत नाही असे अर्थातच यांत सूचित केले आहे.४०.

**इत्युक्तो गुरुणा हृष्टो भक्तः क्षेत्रं स्वमेत्य सः । लेभेऽसम्भाव्यसस्यर्धिं लोके श्रैष्ठ्यं च संविदम् ।।४१।।**
**स एत्य नित्यमानर्च गुरुं प्राहैकदा गुरो । काश्यां तु त्रिस्थलीयात्रा वरेत्याहुर्न वेद्मि ताम् ।।४२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**प्रयागः संगमः काशीयं गया करवीरपूः । दर्शयामीदमेतद्वत् त्रिस्थलं ते द्रुतं परम् ।।४३।।**
**इत्युक्त्वा धारयित्वा स्वपादुके त्रिस्थलीं त्विमाम् । प्रयागकाश्यौ गयां च दर्शयित्वागमत्क्षणात् ।।४४।।**

इति गुरुणा उक्तः हृष्टः सः भक्तः स्वं क्षेत्रं एत्य असम्भाव्य+सस्य+ऋद्धिं, लोके श्रैष्ठ्यं संविदं च लेभे।४१। सः नित्यं गुरुं एत्य आनर्च। एकदा सः प्राह, '(हे) गुरो! काश्यां त्रि+स्थली+यात्रा तु वरा इति आहुः। तां न वेद्मि।'४२। श्रीगुरुः उवाच। '(अयं) संगमः प्रयागः, इयं काशी, करवीरपूः गया। इदं दर्शयामि। एतत्+वत् (अ)परं त्रिस्थलं ते द्रुतं दर्शयामि।'४३। इति उक्त्वा स्वपादुके धारयित्वा, 'इमां त्रिस्थलीं तु', प्रयाग+काश्यौ गयां च क्षणात् दर्शयित्वा आगमत्।४४।

श्रीगुरूंशी असा संवाद केल्यावर आनंदभरित झालेला तो भक्त आपल्या शेतीवर परतला. त्याच्या शेतांत त्याला कल्पनेबाहेर पीक आले. समजांतही त्याला मानमान्यता मिळाली आणि आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक करणारी बुद्धी प्राप्त होऊन तो ब्रह्मज्ञानी झाला.४१. तो गंगानुज नांवाचा शेतकरी रोज औदुंबराला येऊन श्रीगुरूंची पूजा करीत असे. एकदां त्याने त्यांना प्रश्न केला, 'गुरुमहाराज, काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा श्रेष्ठ आहे असे म्हणतात ती मी जाणत नाही.' काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा नाही; पण त्याच्याच पुढील बोलण्यावरून तो अज्ञानानेच तसे बोलतो आहे हे स्पष्ट आहे.४२. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'हा कृष्णापंचगंगासंगमच प्रयाग आहे; त्यापुढे कृष्णेतील युगालय नावाचे क्षेत्र हीच काशी आहे; तसेच कोल्हापूर हीच गया आहे. ही त्रिस्थळी तुला दाखवितो. तशीच दुसरीही त्रिस्थळीही लगेच दाखवितो.'४३. असे बोलून आणि त्याला आपल्या पादुका धरायला लावून त्याला योगगतीने नेऊन ही (संगम-युगालय-कोल्हापूर) त्रिस्थळी तर दाखविलीच पण प्रयाग, काशी आणि गया ह्या ठिकाणीही नेऊन तीसुद्धा त्रिस्थळी यात्रा घडविली आणि क्षणांत परत संगमावर आपल्या आश्रमांत आणून सोडले.४४.

**तमाह त्रिस्थली त्वेषा दर्शितान्यापि तादृशी । साम्यं ज्ञात्वोभयोरत्र स्वाचारान्मुक्तिमेष्यसि ।।४५।।**
**इति योगीशवाक्यं स श्रुत्वा ज्ञात्वाऽस्य चेष्टितम् । तद्ध्यानात्कर्मबन्धं द्राक् छित्वा मुक्तो बभूव ह ।।४६।।**
**वृद्धोऽत्र महिमा सन्त आयास्यन्तीतरेऽप्यतः । गन्तव्यं क्वापि न स्थेयं साक्षादत्रेत्यमंस्त सः ।।४७।।**

तं आह, 'एषा तु त्रिस्थली दर्शिता, अन्या अपि तादृशी (दर्शिता)। उभयोः साम्यं ज्ञात्वा अत्र स्व+आचारान् मुक्तिं एष्यसि।'४५। इति योगी+ईश+वाक्यं श्रुत्वा, अस्य चेष्टितं ज्ञात्वा, तद्+ध्यानात् कर्म+बन्धं द्राक् छित्वा मुक्तः बभूव ह ।४६। अत्र महिमा वृद्धः। सन्तः, इतरे अपि आयास्यन्ति। अतः अत्र साक्षात् न स्थेयं (अन्यत्र) क्व अपि गन्तव्यं इति सः अमंस्त।४७।

मग श्रीगुरु त्या गंगानुजाला म्हणाले, 'तुला ही त्रिस्थळी आणि तशीच दुसरीही त्रिस्थळी दाखविली. या दोन्हींचे साम्य जाणून तूं आपला विहित आचार करून मुक्ती पावशील.' स्वाचार शब्दाने इथे शास्त्रानुसार विहित आचाराचे निष्काम अनुष्ठान अभिप्रेत आहे.४५. असे त्या योगिराज श्रीगुरूंचे वचन ऐकून, त्यांच्या अलौकिक लीलांचे चिंतन आणि श्रीगुरूंचे ध्यान ह्यांच्या प्रभावाने आपल्या कर्मबंधनाचा शीघ्रच छेद करून तो गंगानुज मुक्त झाला.४६. 'इथे महिमा खूपच वाढला आहे. आतां साधुजनांबरोबरच इतरही मतलबी लोकांची गर्दी वाढेल. तरी आपण आतां इथे ह्या प्रत्यक्ष रूपाने न राहतां अन्यत्र कुठे तरी जावे,' असा त्यांनी (श्रीगुरूंनी) विचार केला. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२३) तर 'या ब्रह्मनिष्ठाचा महिमा नित्य आहे तो कर्मामुळे न वाढतो न घटतो,' असे म्हटले आहे. मग इथे महिमा वाढला हे म्हणणे त्याशी विसंगत नाही कां? ह्या आक्षेपाचे उत्तर श्रीस्वामिमहाराजांनी असे दिले आहे की, सच्चिदानंदस्वरूप निर्गुण ब्रह्माच्या महिमानाची कर्मामुळे वृद्धी वा क्षय होत नाही हे खरेच आहे. सगुण ब्रह्माच्या विषयी मात्र लोकांना जसजसे अनुभव येतात त्यानुसार तसतसे त्यांच्या लेखी माहात्म्य वाढते. वस्तुतः श्रुतीचेच प्रतिपादन सयुक्तिक आहे.४७.

**नो हित्वाद्य क्व यासीति विलपन्तीः स योगिनीः । आश्वास्योचेऽत्र तिष्ठामि लोकदृष्ट्या गमिष्य इत् ॥४८॥**
**अमरेशोऽन्नपूर्णात्र विघ्नेशो युष्मदादयः । भक्तेष्टदा मयाऽप्यत्र स्थेयं वस्तुष्टये सदा ॥४९॥**
**इतः प्रभृत्यदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति । बहुलोकनिवासोऽत्र यास्यन्त्यत्र जनाः सुखम् ॥५०॥**

नः हित्वा क्व यासि? इति विलपन्तीः योगिनीः सः आश्वास्य ऊचे, लोकदृष्ट्या गमिष्ये, अत्र तिष्ठामि।४८। इतः प्रभृति अदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति। बहुलोकनिवासः। जनाः सुखं यास्यन्ति। ४९। अत्र अमरेशः, अन्नपूर्णा, विघ्नेशः, युष्मदादयः भक्त+इष्टदाः। वः तुष्टये मया अपि अत्र सदा स्थेयम्।५०।

श्रीगुरूंच्या ह्या संकल्पाने दुःखित झालेल्या योगिनींनी कळवळून त्यांना विनविले, ‘आम्हांला सोडून कुठे जातां?’ त्यावर त्यांची समजूत घालीत श्रीगुरू म्हणाले, ‘योगिनींनो, मी मानवरूपाने अवतार घेतला आहे त्यानुसार लोकांच्या दृष्टीने मी जात असलो तरी खरोखर मी इथेच तुमच्याजवळ राहणार आहे. मी सर्वव्यापी असल्याने माझे कुठे जाणे वा येणे संभवतच नाही.’४८. इथून पुढे हे क्षेत्र सुप्रसिद्ध होईल. इथे खूप लोक राहतील. दुःखी असलेले लोकही इथे येऊन त्या स्थानाच्या प्रभावाने सुख पावतील. **सुखं** या शब्दाचा अर्थ इथे परमानंद किंवा ब्रह्मानंद असा केला आहे. ह्याला छांदोग्य उपनिषदाचा (४:१०:५) आधार घेतला आहे. *‘यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव खं’* जे आकाश ते सुख म्हणजे आकाशविशिष्ट सुख. यांत अन्य इंद्रियजन्य सुखाचा अंतर्भाव होत नाही. जसे नीलकमल असे म्हटल्यावर निळ्या नसणाऱ्या, लाल-पिवळ्या कमळांचा अंतर्भाव होत नाही. *‘यदेव खं तदेव खं’* या पदांत सुखाला आकाशाचे विशेषण करून सुखविशिष्ट आकाश हे भौतिक अचेतन आकाशापेक्षां भिन्न दाखविले आहे. यांवरून हार्दाकाशाचा किंवा अंतराकाशाचा बोध होतो. अंतराकाशांत अनुभवाला येणारे अतींद्रिय सुख म्हणजेच ब्रह्मानंद असा निष्कर्ष निघतो.४९. इथे अमरेश्वर, अन्नपूर्णा, विघ्नराज आणि योगिनीप्रमुख तुम्ही सर्व देवता भक्तांच्या इष्ट कामना पुरवीत असाल. तुमच्या संतोषासाठी मलाही सदैव इथे राहावेच लागेल.५०.

**सन्निपाताक्षिरुङ्मेह-कुष्ठश्लेष्मक्षयज्वरान् । वातपैत्तिकगुल्माद्यान् देशाद्युत्थान्हरेदिदम् ।।५१।।**
**पुत्रं वन्ध्याऽभयं त्रस्तो निःस्वः स्वं रोग्यनामयम् । मुमुक्षुः सद्गतिं यद्यद्यस्येष्टं स लभेत्सदा ।।५२।।**
**सहस्रगोदानफलं पर्वक्रान्तिग्रहाप्लुतौ । नुः कोटिफलमत्राल्प-जपहोमसुरार्चनैः ।।५३।।**
**प्रदक्षिणाऽश्वमेधादि-फलदा नुः पदे पदे । दुर्गताः पितरोऽप्यत्र श्राद्धाद्यान्ति परां गतिम् ।।५४।।**
**इत्याश्वास्य स योगिनीः परतरः कल्पद्रुमूलेऽमले । संस्थाप्य स्वसुपादुके नर इह स्नात्वार्चयेदष्टसु ।।**
**तीर्थेष्वीश्वरयोगिनीसुरयुते मत्पादुके द्राग्लभेत् । सोऽभीष्टं त्विति ताः प्रभाष्य स ययौ भीमातटं योगिराट् ।।५५।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे कृष्णापञ्चनदीसङ्गमोत्कर्षकथनं नामैकादशोऽध्यायः ।।११।।**

सन्निपात+अक्षिरुक्+मेह+कुष्ठ+श्लेष्म+क्षय+ज्वरान् वात+पैत्तिक+गुल्म+आद्यान् देशादि उत्थान् इदं हरेत्।५१। वन्ध्या पुत्रं, त्रस्तो अभयं, निःस्वः स्वं रोगी अनामयं, मुमुक्षुः सद्गतिं, यत् यत् यस्य इष्टं सः सदा लभेत्।५२। पर्व+क्रान्ति+ग्रह+आप्लुतौ सहस्र+गो+दान+फलम्। अत्र अल्प+जप+होम+सुर+अर्चनैः नुः कोटिफलम्।५३। प्रदक्षिणा नुः पदे पदे अश्वमेधादि फलदा। दुर्गताः पितरा अपि अत्र श्राद्धात् परां गतिं यान्ति।५४। इति योगिनीः आश्वास्य सः परतरः अमले कल्पद्रु+मूले स्व+सुपादुके संस्थाप्य, '(यो) नरः इह अष्टसु तीर्थेषु स्नात्वा ईश्वर+योगिनी+सुर+युते मत्पादुके अर्चयेत् सः द्राक् अभीष्टं लभेत्।' इति ताः प्रभाष्य सः योगिराट् भीमा+तटं ययौ।५५।

सन्निपात, नेत्ररोग, मूत्रविकार, कुष्ठ, कफ, क्षय, ज्वर, वात, पित्त, गुल्म इत्यादि विकार तसेच महामारीसारखे सांसर्गिक रोगही ह्या क्षेत्राच्या प्रभावाने कसल्याही चिकित्सेविना दूर होतील.५१. वांझेला मूल, पीडिताला अभय, निर्धनाला धन, रोग्याला आरोग्य, मुमुक्षूंना सद्गती, ज्याला ज्याला ज्याची इच्छा असेल ते त्याला नेहमीच लाभेल.५२. दर्शादि पर्वकाळी, मेषादि रविसंक्रमणांत, सूर्य-चंद्रग्रहणांत इथे स्नान केल्याने हजार गाई दान केल्याचे फळ लाभेल. थोड्याही प्रमाणांत केलेल्या जप, होम आणि देवपूजा यांचे कोटीपट फळ मनुष्याला लाभेल.५३. येथे प्रदक्षिणा

केल्याने पुरुषाला पावलोपावली अश्वमेधादि यज्ञाचे फळ मिळेल. एखाद्याचे पितर जरी नरकात असतील तरी इथे श्राद्ध केल्याने त्यांना उत्तम गती मिळेल.५४. असे त्या योगिनींना आश्वासन देऊन त्या परमात्म्याने औदुंबराच्या तळवटी आपल्या मनोहर पादुकांची स्थापना केली आणि म्हणाला, 'जो कोणी पुरुष (स्त्री) ह्या क्षेत्रांत अष्टतीर्थांत स्नान करून अमरेश्वर, चौसष्ट योगिनी आणि इतर देवतांची पूजा करील त्याच्या मनोकामनांची शीघ्र पूर्ती होईल.' मग ते योगिराज भीमातीरावर गाणगापूर येथे गेले.५५.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा अकरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# द्वादशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**गतेऽपि भगवत्यङ्ग कृष्णावेणीतटाश्रमात् । तस्मात्तत्रैव भजतां कार्यसिद्धिः कुतो वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गतिस्थित्यासनस्वप्ना न कदापि चिदात्मनि । लीलेयं मानुषी तस्य नरानुकृतिकारणः ।।२।।**

नामधारक उवाच। 'हे अङ्ग! भगवति कृष्णावेणी+तट+आश्रमांत् गते अपि तत्र एव भजतां कस्मात् कुतो कार्यसिद्धिः? वद।१।
गति+स्थिति+आसन+स्वप्नाः चित्+आत्मनि कदा+अपि न। इयं तस्य नर+अनुकृति+कारणः मानुषी लीला।२।

*श्रीगणेशाय नमः। भूतबाधा निरसुनी ब्राह्मणीते पुत्र दिला। द्वादशाध्यायी श्रीगुरूंनी मृतपुत्रहि जीवविला।।१।।* अशा रीतीने गुरुकृपा झालेल्या विषयासक्त शिष्यांनाही श्रीगुरूंच्या कृपाप्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक सिद्धी प्राप्त होतात हे मागच्या अध्यायांत सांगितले. आतां या अध्यायांत भजनाची आवड उपजविण्यासाठी त्याच सगुणरूपधारी श्रीगुरूंच्या भक्तवात्सल्याचे निरूपण करीत आहेत. नामधारक सिद्धमुनींना विचारतात. अहो सिद्धमुनी, भगवान तर कृष्णावेणीच्या तटावरील आश्रमांतून गाणगापूरला निघून गेले. तरीही तिथेच यज्ञ-दान-तप इत्यादि उपासना करणाऱ्या भक्तांना कोणत्या दैवताकडून आणि केव्हांपासून फळ मिळाले? श्रीगुरू तर तिथे नव्हते. मग त्यांच्या भक्तांची कार्ये कशी सफळ झाली?१. नामधारकाच्या या प्रश्नाचे उत्तर उदाहरणासहित देत आहेत. उदाहरण म्हणजे सार्वत्रिक नियम सिद्ध करण्यासाठी एका अंशाचे परीक्षण. जशी शितावरून भाताची परीक्षा. **गती** म्हणजे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे; **स्थिती** म्हणजे एकाच स्थळी राहणे; **आसन** म्हणजे बसून राहणे; आणि **स्वप्न** म्हणजे निजणे. हे सगळे आत्म्याचे धर्म नाहीत. चैतन्यस्वरूप श्रीगुरूंच्या ठिकाणी संभवत नाहीत.

**भाव्यतेऽजो भावनया यद्वत्तद्वद्विभात्यसौ । एवं यद्भावनात्रेदृक् तादृग्जागर्ति तत्र सः ॥३॥**
**योगिनीवरदानादि यैर्यैर्गङ्गानुजाच्छ्रुतम् । ते ते भक्त्याभजंस्तत्र तं स तत्कामदोऽभवत् ॥४॥**

यैः यैः गङ्गानुजात् योगिनी+वर+दानादि श्रुतं ते ते भक्त्या तत्र अभजन्। तं सः कामदः अभवत्।३। अजः भावनया यद्+वत् भाव्यते तद्+वत् असौ भाति। एवं अत्र ईदृक् यत् भावना तत्र तादृक् जागर्ति।४।

'हे निर्गुण परमात्म्याच्या विषयी ठीक आहे. स्वेच्छेने कां होईना सगुण रूप धारण केलेल्या श्रीगुरूंना हे सर्व धर्म असणारच की.' या शंकेचे समाधान असे केले आहे की सत्य-ज्ञान-अनंत-आनंद यांच्या एकरसाने आपल्या नित्य षड्गुण ऐश्वर्यासहित अवतरलेल्या श्रीगुरूंचा देहादि उपाधीशी संपर्कच होऊं शकत नाही. तेव्हां हे सर्व शरीरधर्म त्यांना स्पर्शूं शकत नाही. मग 'ते भामीतीरी गेले,' असे तुम्हीच म्हणाला, त्याची काय वाट? तर स्वेच्छेने मनुष्यरूप घेतलेल्या सद्गुरूंची ही जाणे-येणे इत्यादि मानवी लीला - नाटक, आहे. निर्गुण ब्रह्म स्वतः एकमेवाद्वितीय असून, चलनादिरहित आहे; तरी एका ठिकाणीच राहूनही इतर धांवणाऱ्या इंद्रियादिकांच्या पलीकडे जातेच ना? *'अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत्। तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति'* (ईशावास्य उ. ४) ब्रह्मानंदकृत ईशावास्यभाष्यरहस्यांत ब्रह्म-विष्णू-शिव या रूपांतील परब्रह्म मायेमुळे साकारते त्याला *'तदेजति'* म्हटले आहे. वस्तुतः परब्रह्म निराकार आणि निश्चलच आहे. चलनाचा आभास उपाधीमुळे आहे. *'तन्नैजति'* या पदाने प्रकृतीच्या पलीकडील निर्गुण ब्रह्माचा बोध होतो.'२. परमेश्वराविषयी ज्याचा जसा भाव तसाच त्याला तो भासतो. त्यानुसार जिथे असा 'फलदाता भगवंत साक्षात् नांदत आहे,' अशी भावना उत्पन्न होते तिथे त्या भावाला अनुसरूनच तो जागतो - इष्टफळ देण्याला सदैव उन्मुख असतो. अशा रीतीने परमार्थांत काय किंवा व्यवहारांत काय ज्याचे जसे जसे ज्ञान असेल त्याला तसेच फळ मिळते. तैत्तिरीय उपनिषदाच्या वचनानुसार (२:६:१) ब्रह्म नाही असे जो म्हणतो तो असतच होतो. ब्रह्माचे अस्तित्वाला मानणारा संत जाणला जातो.'

**शृण्वेवं सति तत्रत्या मृतापत्यत्वदुःखिता । काचिद् द्विजसती विप्रान्स्वस्त्यर्थं शरणं ययौ ।।५।।**
**प्रपन्नां प्रेक्ष्य तां दीनां निजभक्तिविधित्सया । देवप्रेरितधीः कश्चित्तद्दैवं भूसुरोऽब्रवीत् ।।६।।**
**मृतापत्यत्वदोषांस्तु शृणु साध्वि पुरार्जितान् । मृतापत्यत्वादिदोषाः प्रायशः प्रेतहेतवः ।।७।।**

शृणु।' एवं सति तत्रत्या मृत+अपत्यत्व+दुःखिता काचित् द्विजसती स्वस्त्यर्थं विप्रान् शरणं ययौ।५। तां दीनां प्रपन्नां प्रेक्ष्य निज+भक्ति+विधत्सया कश्चित् भूसुरः तत्+दैवं अब्रवीत्।६। (हे) साध्वी, शृणु। मृत+अपत्य+दोषान् तु पुरा अर्जितान्। प्रायशः मृत+अपत्य+दोषाः प्रेत+हेतवः।७।

यावर श्रीमच्छंकराचार्यांचे भाष्य असे आहे, जो ब्रह्माचे (परमात्म्याचे) अस्तित्व मानीत नाही त्याची सर्व सन्मार्गावर, वर्णाश्रमधर्मावर श्रद्धा राहत नाही. साहजिकच तो ईश्वराला विमुख होऊन नास्तिक होतो आणि लोकांत असाधू गणला जातो. त्याच्या उलट जो ब्रह्म आहे असे म्हणतो तो ब्रह्माकडे - ईश्वराकडे नेणाऱ्या वर्णाश्रमधर्मादि सन्मार्गांवर श्रद्धा ठेवून तसे आचरण करतो. साहजिकच साधुजन त्याला सन्मार्गावर चालणारा - संत असे ओळखतात.३. ज्यानी ज्यांनी गंगानुजाकडून योगिनींना श्रीगुरूंनी दिलेले वरदान इत्यादि वृत्त ऐकले त्यांनी त्यांनी त्या पादुकांची भक्तीपूर्वक उपासना केली. त्या सर्वांच्या कामना भगवंतांनी पूर्ण केल्या.४. सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, ऐक! असा क्रम तिथे चालूं असतां तेथील (नजीकच्या शिरोळ गांवातील) एक जन्मतः होणाऱ्या अर्भकांच्या मृत्यूमुळे त्रस्त असलेली एक ब्राह्मणस्त्री ब्राह्मणांना शरण गेली आणि तिने आपली मुले वाचविण्याचा उपाय विचारला.५.

**ब्रह्महा भ्रूणहा वाऽपि गोघ्नोऽश्वघ्नोऽपरार्थहृत् । ब्रह्मस्वात्स्वर्णहा पापी लभेज्जन्मान्तरे त्विदम् ।।८।।**
**लोहाश्मदारुचूर्णानि प्रयत्नाज्जरयेत्पुमान् । ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति ।।९।।**
**हृतस्वार्थाभिलाषेण चेन्मृतो ब्राह्मणः स तु । गत्वा पिशाचतां स्वार्थी सदा स्याद्धर्तृवंशहा ।।१०।।**

ब्रह्महा, भ्रूणहा वा, गोघ्नः, अश्वघ्नः अपि, अपर+अर्थ+हृत्, ब्रह्म+स्व+अत्, स्वर्ण+हा पापी तु जन्म+अंतरे इदं लभेत्।८। हृत+स्व+अर्थ+अभिलाषेण ब्राह्मणः मृतः चेत् स तु स्वार्थी पिशाचतां गत्वा सदा हर्तृ+वंश+हा स्यात्।९। लोह+अश्म+दारु+चूर्णानि पुमान् प्रयत्नात् जरयेत्। ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति?१०।

त्या काकुळतीने विनवणी करणाऱ्या ब्राह्मणीला पाहून, तिला आपल्या भक्तीकडे आकृष्ट करण्यासाठी श्रीगुरूंनीच ज्याच्या बुद्धीला प्रेरणा केली होती अशा कुणा एका ब्राह्मणाने तिला तिच्या प्राक्तनाची कल्पना दिली. ज्योतिष्यादि शास्त्राच्या आधारे नव्हे तर श्रीगुरुप्रेरित बुद्धीने!६. प्रथमतः त्याने सामान्यतः जन्मतांच मुले मरण्याला कारण असलेल्या पापांविषयी सांगितले. 'हे दोष पूर्वजन्मार्जित असतात,' असे सांगून तो म्हणाला, 'हे दोष बहुतेक पिशाचबाधेमुळे घडतात.७. ब्राह्मणाची हत्या करणारा, स्त्रियांचे गर्भ किंवा अर्भक यांची हत्या करणारा, परद्रव्याचा अपहार करणारा, ब्राह्मणाच्या द्रव्याचा बळजबरीने अथवा चोरीने उपभोग घेणारा, सोन्याची चोरी करणारा किंवा अशीच इतर पापे करणाऱ्याला पुढच्या जन्मात हे मृत अर्भकाचे दुःख भोगावे लागते.' तु शब्दाने तशीच उत्कट पापे असतील तर हितोपदेशांत (मित्रलाभ कथा ३) सांगितल्याप्रमाणे या जन्मांतही असे दुःख प्राप्त होऊं शकते. ('*अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते।*')८. सर्व पापांत ब्राह्मणाच्या द्रव्याचा अपहार मोठा असल्याचे सांगतात. लोखंड, दगड वा लाकूड यांचा चुराही कुणी प्रयत्नाने पचवूं शकतील. पण ब्राह्मणाकडून लुबाडलेले द्रव्य त्रैलोक्यांत कोण कसे पचवील? अर्थात् कुणीही पचवूं शकत नाही.९. आपल्या अपहार झालेल्या द्रव्याच्या लोभाने जर तो ब्राह्मण मृत झाला तर तो स्वार्थाभिलाषी पिशाच योनीत जातो आणि आपले द्रव्य लुबाडणाऱ्याच्या वंशच्छेद करतो.१०.

**त्वया भवान्तरे साध्वि हृतं शौनकगोत्रिणः । द्रव्यं विप्रस्य सोऽर्भांस्ते भूत्वा प्रेतो निहन्त्युत ।।११।।**
**भोगादेव क्षयः साध्वि नान्यथारब्धकर्मणः । तस्मात्प्रारब्धजफलं भुङ्क्ष्व कोऽत्र निवारकः ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा कर्णशूलाभं त्रस्तचित्ताऽब्रवीद् द्विजम् । भो ब्रह्मन्मानुगृह्णीष्व मुक्त्युपायमुपादिश ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्रेतौर्ध्वदेहिकं कर्म प्रायश्चित्तपुरःसरम् । कारयित्वाङ्ग भर्त्रा त्वं मासमात्रं व्रतं चर ।।१४।।**

(हे) साध्वि, त्वया भव+अंतरे शौनक+गोत्रिणः विप्रस्य द्रव्यं हृतम्। सः प्रेतः भूत्वा ते अर्भान् निहन्ति उत।११। (हे) साध्वि, आरब्ध+कर्मणा भोगात् एव क्षयः। न अन्यथा। तस्मात् प्रारब्धजं फलं भुङ्क्ष्व। अत्र कः निवारकः?१२। तत् कर्ण+शूलाभं श्रुत्वा त्रस्त+चित्ता द्विजं अब्रवीत्। भो ब्रह्मन्, मां अनुगृह्णीष्व, मुक्ति+उपायं उपादिश।१३। विप्र उवाच। प्रेत+और्ध्वदेहिकं प्रायश्चित्त+पुरःसरं कर्म भर्त्रा कारयित्वा त्वं मासमात्रं व्रतं चर।१४।

इथपर्यंत सामान्य शास्त्रार्थ सांगून आतां तो ब्राह्मण त्या स्त्रीचे विशिष्ट कर्म सांगत आहे. ‘हे सती, तूं पूर्वजन्मी एका शौनकगोत्रीय ब्राह्मणाचे पैसे लुबाडले. तोच आतां पिशाच होऊन तुझी बाळे मारीत आहे.११. हे सती, आपण जन्माला येतांना बरोबर आणलेले कर्म - म्हणजे प्रारब्ध. ते भोगूनच संपवतां येते. दुसरा कांहीही उपाय नाही. तेव्हां तुझ्या प्रारब्धकर्माचे फळ भोग. त्याचा कोण प्रतिकार करूं शकेल? अर्थात् कुणीही नाही.’१२. ते कर्णकटु बोल ऐकून त्या ब्राह्मणीचे मन संत्रस्त झाले. ती त्या ब्राह्मणाला म्हणाली, ‘अहो विप्रवर! ह्या दुःखांतून सुटण्याचा कांही उपाय आपण मला सांगावा.’१३. त्या ब्राह्मणाने तिला सांगितले, ‘त्या पिशाच झालेल्या ब्राह्मणाचे शास्त्रोक्त पिंडदानादि अंत्यकर्म, नारायणबळी इत्यादी अनुष्ठानांसहित तुझ्या पतीकडून करवून घे आणि मी पुढे सांगणार असलेले व्रत एक महिनाभर कर.’ पतीच्या द्वारा अंत्येष्ट्यादि कर्मे करवून घ्यायला सांगण्याचे कारण स्त्रियांना ते स्वतंत्रपणे करायला शास्त्राज्ञा नाही. ‘पतिद्वारा करवून घे’ ह्या सांगण्यांत स्त्रीच मुख्य कर्ता आहे असा अर्थ काढूं नये. पतीला सांगून ते करावे असा अर्थ विवक्षित आहे.१४.

**कृष्णापञ्चनदीयोगे स्नात्वा श्रीगुरुपादुकाम् । उदुम्बरं चाष्टतीर्थस्नानपूर्वं समर्चय ॥१५॥**
**ब्राह्मणान्भोजयित्वाथ शतद्रव्यं द्विजातये । देहि शौनकगोत्राय शुद्धिस्तेनैव ते सति ॥१६॥**

**॥ ब्राह्मण्युवाच ॥**

**शतद्रव्यं कुतो लभ्यं मासमात्रं करोम्यहम् । सद्गुरोरर्चनं भक्त्या स मां पायाद्भयाद्धरिः ॥१७॥**
**इति निश्चित्य सा पत्या यथानिर्दिष्टमाचरत् । दिनत्रयान्तरे स्वप्ने तस्या विप्रपिशाचकः ॥१८॥**

कृष्णा+पंचनदी+योगे स्नात्वा, अष्ट+तीर्थ+स्नानपूर्वं श्रीगुरु+पादुकां उदुम्बरं च समर्चय।१५। अथ ब्राह्मणान् भोजयित्वा शौनक+द्विजातये शतद्रव्यं देहि। (हे) सति, तेन एव ते शुद्धिः (भविष्यति)।१६। ब्राह्मणी उवाच। शतद्रव्यं कुतो लभ्यम्? अहं मासमात्रं भक्त्या सद्गुरोः अर्चनं करोमि। सः हरिः मां भयात् पायात्।१७। इति निश्चित्य सा पत्या यथा+निर्दिष्टं आचरत्। दिन+त्रय+अंतरे तस्या स्वप्ने विप्र+पिशाचकः।१८।

प्रथम कृष्णा आणि पंचगंगा यांच्या संगमांत न्हाऊन मग अष्टतीर्थांत स्नाने करावीत आणि श्रीगुरूंच्या पादुकांची तसेच औदुंबर वृक्षाची विधिपूर्वक पूजा करावी.१५. 'एक महिनाभर असे व्रत आचरून यथाशक्ती ब्राह्मणांना भोजन घालून त्या प्रेतासाठी म्हणून शौनक गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला शंभर रौप्य मुद्रांचे दान कर. हे साध्वी, ह्यानेच तुझ्या पापाची निष्कृति होईल.'१६. ती ब्राह्मणी म्हणाली, 'शंभर रौप्यमुद्रा मी कुठून आणूं? मात्र एक महिनाभर मनोभावे मी सदगुरूंची पूजा करीन. तो हरीच माझे या पिशाचाच्या भयापासून रक्षण करो.'१७. असा मनाचा निश्चय करून त्या ब्राह्मणीने आपल्या पतीसह ब्राह्मणाने सांगितल्याप्रमाणे सर्व अनुष्ठान सुरूं केले. तीन दिवसांनी तिच्या स्वप्नांत येऊन एक ब्रह्मसमंध तिला भीती दाखवून(१८) आपले पूर्वजन्मींचे लुबाडलेले धन मागूं लागला. त्या भयभीत सतीली औदुंबराच्या मुळापाशी दुःख हरण करणाऱ्या श्रीगुरूंचे दर्शन झाले.१९.

**ब्राह्मणीं भीषयित्वा तां ययाचे द्रव्यमात्मनः । भीतोदुम्बरमूले सा ददर्श श्रीगुरुं हरिम् ।।१९।।**
**तां च तं तादृशं दृष्ट्वा पिशाचं प्राह सद्गुरुः । कस्त्वं पिशाचरूपेण सतीं खेदयसेऽधम ।।२०।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**यतीन्द्र त्वय्यनर्होऽयं पक्षपातोऽहमात्मनः । अनयाऽपहृतं द्रव्यं याचितुं हीदृशोऽभवम् ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**अनेन ते कथं मोक्षो बह्वमङ्गलयोनितः । येनाप्यते सद्गतिस्तच्छृणु तेन हितं भवेत् ।।२२।।**

ब्राह्मणीं भीषयित्वा तां आत्मनः द्रव्यं ययाचे। भीता सा उदुम्बर+मूले श्रीगुरुं हरिं ददर्श।१९। तां तादृशं, तं च दृष्ट्वा सद्गुरुः पिशाचं प्राह। (रे) अधम! सतीं पिशाचरूपेण खेदयसि, त्वं कः?२०। पिशाच उवाच। (हे) यतीन्द्र! अयं पक्षपातः त्वयि अनर्हः। अनया अपहृतं आत्मनः द्रव्यं याचितुं अहं ईदृशं अभवम् हि।२१। श्रीगुरुः उवाच। अनेन ते बहु+अमंगल+योनितः कथं मोक्षो? येन सद्गतिः आप्यते तत् शृणु। तेन हितं भवेत्।२२।

त्या भयाकूल ब्राह्मणीला आणि तिला भिवविणाऱ्या त्या पिशाचाला पाहून त्याला सद्गुरूंनी विचारले, ‘अरे नीचा! त्या बिचाऱ्या सतीला कष्ट देणारा तूं कोण आहेस?’२०. तो समंध उत्तरला, ‘अहो यतिराज, आपल्यासारख्या संन्याशाला हा पक्षपात शोभत नाही. ह्या स्त्रीने लुबाडलेले माझे धन मागतां मागतां मला ही अशी अमंगळ अवस्था प्राप्त झाली.’ धनाच्या वासनेने आपल्याला या योनीत खेचून आणले असल्याने आपला कांही दोष नाही असा त्या पिशाचाचा दावा आहे.२१. श्रीगुरू त्याला म्हणाले, ‘अशा भयंकर अपत्यहत्येने तिचा छळ करून तुझी ह्या अत्यंत अमंगळ कष्टप्रद योनीतून कशी सुटका होईल? तुला सद्गती लाभेल असा उपाय ऐक. त्याने तुझे कल्याण होईल. ह्या दुःखद योनीतून तुझी मुक्ती होईल.२२.

**योन्यन्तरे हृतार्थोऽस्ति किंत्वत्र फलभागिनी । प्राप्ता दरिद्रवंशेऽसौ लभ्यतेऽतः कुतो धनम् ।।२३।।**
**अतस्तया कारयित्वा शक्त्या कर्मौर्ध्वदेहिकम् । त्वद्गोत्राय यथालभ्यं दापयित्वा धनं खलु ।।२४।।**
**विप्राय प्रेत कस्मैचित्ततो मोक्षं ददामि ते । नेदं त्वां रोचते चेत्तां रक्षामि स्वेच्छयाचर ।।२५।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**देवदेव कृतार्थोऽस्मि त्वत्पादाब्जविलोचनात् । ममाद्य निष्कृतिर्जाता यथेच्छसि तथा कुरु ।।२६।।**
**एवं तन्निश्चयं ज्ञात्वा ब्राह्मणीं प्राह सद्गुरुः । संवादो नौ श्रुतः साध्वि तथा निर्व्याजमाचर ।।२७।।**

हृतः अर्थः योनि+अन्तरे अस्ति। किंतु असौ अत्र फलभागिनी दरिद्रवंशे प्राप्ता। अतः धनं कुतो लभ्येत्?२३। (हे) प्रेत, अतः तया शक्त्या और्ध्वदेहिकं कर्म कारयित्वा त्वत्+गोत्राय कस्मैचित् विप्राय यथालभ्यं धनं दापयित्वा ते मोक्षं ददामि खलु। इदं त्वां न रोचते चेत् तां (अहं) रक्षामि। (त्वं) स्वेच्छया आचर।२५। पिशाच उवाच। '(हे) देवदेव! त्वत्+पाद+अब्ज+विलोचनात् (अहं) कृतार्थः अस्मि। अद्य मम निष्कृतिः जाता। यथा इच्छसि तथा कुरु।'२६। एवं तत्+निश्चयं ज्ञात्वा सद्गुरुः ब्राह्मणीं प्राह। (हे) साध्वि, नौ संवादः (त्वया) श्रुतः। तथा निर्व्याजं आचर।२७।

तिने तुझ्याकडून पूर्वजन्मी हिरावलेल्या शंभर रौप्यमुद्रा तर त्याच जन्मांत राहिल्या. आतां ह्या जन्मांत त्या अपहाराच्या पापाचे फळ ही भोगत असल्याने बिचारी दरिद्री कुळांत जन्मली आहे. मग तिला कुठून एवढे पैसे मिळणार?२३. अरे समंधा, एवढ्यासाठी ह्या ब्राह्मणीकडून यथाशक्ती तुझे अंत्यसंस्कार करवून आणि तुझ्या गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला तिला शक्य असेल तेवढे पैसे देववून मी तुला या योनीतून नक्की मुक्त करीन.२४. तुला हे पटत नसेल तर तुला वाटेल ते तूं कर! मी ह्या सतीचे रक्षण करीन.२५. तो समंध म्हणाला, 'देवाधिदेवा दत्तात्रेया! आपल्या चरणकमलांच्या दर्शनाने मी कृतकृत्य झालो आहे. माझ्या पापकर्माची निष्कृती झाली आहे. आपण आपल्या इच्छेनुसार काय ते करावे.'२६. असा त्या पिशाचाचा निश्चय जाणून त्या ब्राह्मणस्त्रीला सद्गुरू म्हणाले, 'हे सती, तूं आमचा संवाद ऐकलास. त्याप्रमाणे ह्या ब्राह्मणाचे क्रियाकर्म निष्कपटपणे कर.'२७.

**तेनासौ सद्गतिं यायाद्वंशवृद्धिश्च ते भवेत् । उक्त्वैवं ध्यानगम्योऽभूद्धरिर्बुद्धाऽभवत्सती ।।२८।।**
**पत्ये शशंस तत्सर्वं तथैवाचीकरत्क्रियाम् । तया प्रेतो गतिं लेभे साप्यपापा बभूव ह ।।२९।।**
**अपरेऽहनि तत्स्वप्ने फले विन्यस्य चांशुके । तामाह भोजयित्वाऽजो विप्रान्भुङ्क्ष्व फलेत्विति ।।३०।।**
**प्रबुद्धापि फले दृष्ट्वा भोजयित्वा द्विजान् फले । कान्तेन साकं बुभुजे ततोऽभूद्गर्भिणी सती ।।३१।।**

तेन असौ सद्गतिं यायात्। ते वंश+वृद्धिः च भवेत्। एवं उक्त्वा हरिः ध्यान+गम्यः अभूत्। सती बुद्धा अभवत्।२८। तत् सर्वं पत्ये शशंस। तथा एव क्रियां आचीकरत्। तया प्रेतः गतिं लेभे। सा अपि अपापा बभूव ह।२९। अपरे अह्नि तत्+स्वप्ने अंशुके फले विन्यस्य च अजः तां आह, विप्रान् भोजयित्वा फले भुङ्क्ष्व।३०। (सा) प्रबुद्धा अपि फले दृष्ट्वा, द्विजान् भोजयित्वा कान्तेन साकं फले बुभुजे। ततः सती गर्भिणी अभूत्।३१।

त्या तूं केलेल्या क्रियाकर्मानि ह्या पिशाचाला सद्गती लाभेल आणि त्याची पीडा जाऊन तुझा वंशही वाढेल.' असे बोलून भगवान् ध्यानगम्य - म्हणजे अदृश्य झाले आणि ती सती जागी झाली.२८. ते सर्व स्वप्न त्या स्त्रीने आपल्या पतीले निवेदन केले. त्याप्रमाणेच त्यांनी सर्व कर्म केले. त्यायोगे त्या पिशाचाचे प्रेतत्व परिहरून तो उत्तम लोकांला गेला. ती सतीही पापरहित झाली. वरील आख्यानाद्वारा कठोपनिषदांत (१:१:२०) नचिकेताने यमाला विचारलेल्या प्रश्नांत 'मृत्यूनंतर जीव असतो असे कुणी म्हणतात तर नसतो असे कांही म्हणतात' या दोन मतांतील, मृत्यूनंतर जीवाला अस्तित्व नसते असे मत खोडून काढले आहे. कठोपनिषदांतच पुढे (२:२:७) जीव आपापल्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार स्थावर किंवा जंगम योनीत जातात असे प्रतिपादन केले आहे.२९. दुसऱ्या दिवशी तिच्या पदरांत दोन नारळ घालून श्रीगुरूंनी तिला सांगितले की 'ब्राह्मणभोजन घालून ही फळे तुम्ही दोघे खा.'३०. जागी झाल्यावरही आपल्या पदरांत फळे पाहून तिने श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ब्राह्मणांना जेवायला घालून ती फळे आपल्या पतीसह भक्षण केली. त्या फळप्रसादाच्या प्रभावाने ती ब्राह्मणी गर्भवती झाली.३१.

**काले दत्तप्रसादेन सूर्याचन्द्रमसाविव । पुत्रावसूत विप्रोऽपि जातकर्मादिकं व्यधात् ।।३२।।**
**ततोऽष्टमेऽब्दे ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा । सम्भाराः संभृताः पित्रा तदाद्भुतमिवाभवत् ।।३३।।**
**अकस्मात्सन्निपातेन ज्येष्ठपुत्रो ममार हि । उच्चै रुरोद तन्माता कोरस्ताडनपूर्वकम् ।।३४।।**

दत्तप्रसादेन काले (सा सती) सूर्या+चंद्रमसौ इव पुत्रौ असूत। विप्रः अपि जात+कर्मादिकं व्यधात्।३२। ततः ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा पित्रा सम्भाराः सम्भृताः। तदा अद्भुतं इव अभवत्।३३। ज्येष्ठपुत्रः अकस्मात् सन्निपातेन ममार हि। तन्+माता उच्चैः क+उरस्+ताडन+पूर्वकं रुरोद।३४।

श्रीदत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने त्या सतीला सूर्य-चंद्रसदृश जुळे मुलगे झाले. तिच्या पतीने शास्त्राप्रमाणे जन्माच्या संबंधीची कर्मे केली.३२. पुढे ज्येष्ठ (जुळ्यांतील नंतर जन्मलेल्या) पुत्राच्या मौंजीबंधनासाठी वडिलांनी सर्व सामुग्री जमवून तयारी केली असतां त्या वेळी एक नवलच घडले.३३. तो थोरला भाऊ अचानक सन्निपाताने मरण पावला. सन्निपात म्हणजे तीनही दोषांचा एकदम प्रकोप होणे. त्यामुळे अभिन्यास नांवाचा अत्यंत गंभीर असा ज्वर होतो. श्रीस्वामि महाराजांनी इथे माधवनिदानांतील ज्वरनिदानांतील श्लोक उद्धृत केले आहेत. शरीराचे तापमान खूप वाढून, सर्व ज्ञानेंद्रियांची (घ्राण, नेत्र, कान इत्यादि) शक्ती क्षीण होते. रोगी एकाच जागेवर निश्चल पडून राहतो. उशीवर डोके बडवून घेतो. सारखा कुशी बदलतो. कधी तरी थोडेसेच बोलतो. इत्यादि लक्षणे सांगितली आहेत. चरकसंहितेत याला अभिषंगज्वर असे म्हटले आहे. तो काम, शोक, भय, क्रोधांनी अभिभूत झालेल्या व्यक्तीला होतो. भूत-पिशाचांच्या अभिषंगानेही तो होतो असे तिथे म्हटले आहे. अशा भयानक विकाराने ग्रस्त झालेला त्या मुलाची वाणी छांदोग्योपनिषदांत (६:८:६) सांगितलेल्या क्रमाने मनांत विलीन झाली, मन प्राणांत, प्राण तेजांत, तेज परदेवतेत विलीन झाले. अंती तो बिचारा मुलगा हात-पाय वेडेवाकडे करीत, मर्मस्थानांच्या नाशाने प्राणांचे उत्क्रमण होऊन सर्व इंद्रियांच्या लयाद्वारे मरण पावला. त्याची माता मस्तक आणि ऊर पिटीत जोरजोराने रडूं लागली.३४.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**हा पुत्र क्व गतोसि त्वं पयो मे स्रवते वृथा । कति शेषेऽचिरं वत्स बुद्ध्यस्वेदं पयः पिब ।।३५।।**
**भोजनावसरोऽयं ते भुक्त्वा रन्तुं चराङ्गणे । वयस्या आह्वयन्ति त्वामुत्तिष्ठोत्तिष्ठ मा स्वप ।।३६।।**
**त्वं नोत्तिष्ठसि चेत्प्राणांस्त्यक्ष्याम्यग्रे तवाधुना । जाता ये पञ्चपुत्रा मे तेषां त्वं प्राणवन्मम ।।३७।।**

ब्राह्मणी उवाच। 'हा पुत्र! क्व गतः असि? मय पयः वृथा स्रवते। कति शेषे? (हे) वत्स! अचिरं बुद्ध्यस्व। पयः पिब।'३५। 'अयं ते भोजन+अवसरः। वयस्याः त्वां रन्तुं आह्वयन्ति। भुक्त्वा अङ्गणे चर। उत्तिष्ठ, उत्तिष्ठ, मा स्वप।३६। अधुना त्वं न उत्तिष्ठसि चेत् तव अग्रे प्राणान् त्यक्ष्यामि। ये मे पंच पुत्रा जाता तेषां त्वं मम प्राणवत्।३७।

ती माता रडतां रडतां पुत्राला उद्देशून बोलूं लागली. 'अरे बाळा, कुठे रे गेलास तू? हे पाहा माझे दूध व्यर्थ वाहून जाते आहे. किती झोपतोस? माझ्या राजा, राजा रे, राजुड्या, लवकर ऊठ, हे वायां जाणारे दूध पी!' 'अरे तुझी जेवायची वेळ झाली आहे. हे तुझे सवंगडी बघ तुला खेळायला बोलावीत आहेत. जेवून त्यांच्याबरोबर अंगणांत खेळायला जा. ऊठ! ऊठ! असा झोपू नकोस!३६. आता जर तू उठला नाहीस तर मी तुझ्यापुढेच जीव देईन. मला जे पाच पुत्र झाले त्यांत तूं माझा जीव की प्राण आहेस.३७. तूं मेलास तर मीही मरून जाईन, कारण तूच माझा प्राण आहेस! बाळा, अगदी गर्भधारणेपासून आजपर्यंत मला तू कांहीसुद्धा त्रास दिला नाहीस. ३८.

**मृते त्वयि मरिष्ये मे यतः प्राणोऽसि केवलम् । रे दोहदप्रभृत्यद्य यावद्दुःखं न दापितम् ।।३८।।**
**गर्भे नष्टास्त्रयोऽर्भास्तद्दुःखं त्वन्मुखवीक्षणात । मया विस्मृतमद्याक-सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि ।।३९।।**
**धर्मोऽयं ते न वार्धक्ये त्राता नौ पुत्र को वद । एवं तद्रुदितं श्रुत्वा तत्रत्या ऊचुरेत्य ताम् ।।४०।।**
**किं शोचसि वृथा भीरु मृत्युर्देवर्षिदानवान् । न विस्मरति कालेऽपि मनुष्याणां तु का कथा ।।४१।।**
**अवतारा येऽवतीर्णास्तेऽपि कालवशं गताः । एवं सति वृथा शोकं त्वं मा कुरु विचारय ।।४२।।**

त्वयि मृते मरिष्ये, यतः केवलं प्राणः असि। रे! दोहद+प्रभृति अद्य यावत् दुःखं न दापितम्।३८। त्रयः अर्भः गर्भे नष्टाः तत् दुःखं त्वन्+मुख+वीक्षणात् मया विस्मृतम्। अद्य अक+सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि?'३९। अयं ते न धर्मः। (हे) पुत्र! वार्धक्ये नौ कः त्राता वद। एवं तत्+रुदितं श्रुत्वा तत्रत्या एत्य तां ऊचुः।४०। '(हे) भीरु, वृथा किं शोचसि? मृत्युः काले देव+ऋषि+दानवान् न विस्मरति। मनुष्याणां तु का कथा?४१। ये अवताराः अवतीर्णाः ते अपि कालवशं गताः। एवं वृथा शोकं मा कुरु। विचारय।'४२।

माझी तीन बाळे गर्भांतच नाश पावली. ते दुःख मी तुझ्याकडे पाहून विसरले. आतां मला दुःखाच्या सागरांत बुडवून कुठे निघालास?३९. आमचा असा त्याग करणे हा तुझा धर्म नाही. आम्हां मायबापांना म्हातारपणी कोण दुसरा सांभाळणारा आहे, सांग बरे! इहलोकांत किंवा परलोकांत पुत्राशिवाय कुणीच त्राता नाही याविषयी श्रीस्वामिमहाराजांनी ऐतरेय ब्राह्मणांतील मंत्राचा (पराकाशांत पुत्रच ज्योतिःस्वरूप आहे. पितर पुत्रामुळेच गाढ अंधःकाराला ओलांडून जातात..' ७:३:१) दाखला दिला आहे.४०. 'भयशीले (स्त्रिये), व्यर्थ कां शोक करतेस? काळ आला की मृत्यू देव, ऋषी वा दैत्य यांनासुद्धां विसकरत नाही (सोडत नाही), मग मनुष्यांची ती काय गोष्ट?४१. रामकृष्णादिक अवतारांचाही यथाकाल नाश झालाच ना? असा व्यर्थ शोक न करता तू नश्वर देह आणि चिरंतन आत्मा यांचा विचार कर.'४२.

**|| सोवाच ||**

**अहो बत पिशाचोत्थं दूरीकृत्य भयं हि मे । येन देवेन यद्दत्तं फलं तद्विफलं कथम् ||४३||**
**यदि तस्य मृषा वाक्यं तं भजन्ति कुतोऽपरे । बिभीषणध्रुवमुखैर्मन्तव्यं तदृतं कथम् ||४४||**
**लोकान्तरे नयाम्येतां तत्कीर्तिं सूनुना सह । एवं रुदित्वा संस्कर्तुं न ददौ शवमङ्गना ||४५||**
**ग्रामे तु भोजनाभावाल्लोकास्त्रस्तास्तदैत्य हि । यदृच्छयाऽब्रवीद्वाग्मी जटिलस्तापसः सतीम् ||४६||**

सा उवाच। 'अहो बत पिशाच+उत्थं भयं दूरीकृत्य येन देवेन यत् फलं दत्तं तत् कथं विफलं (जातम्)?४३। यदि तस्य वाक्यं मृषा तं अपरे कुतो भजन्ति? बिभीषण+ध्रुव+मुखैः तत् कथं ऋतं मन्तव्यम्?४४। एतां तत्+कीर्तिं सूनुना सह लोकान्तरे नयामि।' अवं रुदित्वा अङ्गना शवं संस्कर्तुं न ददौ।४५। ग्रामे तु भोजनाभावात् लोकाः त्रस्ताः। तदा हि जटिलः तापसः वाग्मी यदृच्छया एत्य सतीं अब्रवीत्।४६।

ती माता म्हणाली, 'अहो काय सांगूं, पिशाचबाधेचा परिहार करून ज्या देवाने हे फळ दिले ते कसे नाश पावले?४३. जर त्या भगवंताचेच वचन मिथ्या झाले तर इतर लोक कसे त्याला भजतील? बिभीषण, ध्रुव इत्यादि भक्तांनी तरी ते कसे खरे मानावे?४४. ही त्याची कीर्ती ह्या माझ्या बाळासह स्वर्गादि लोकांत घेऊन जाते.' अशा प्रकारे विलाप करीत ती स्त्री आपल्या पुत्राचे शव अंत्यसंस्कारांसाठी देईना.४५. प्रेतसंस्काराशिवाय गांवात कुणालाही जेवतां आले नाही आणि सगळे लोक त्रासून गेले. त्या वेळी एक वाक्पटु जटाधरी तापसी अचानक तिथे आला आणि त्या सतीला उद्देशून बोलूं लागला.४६.

॥ तापस उवाच ॥

**किं शोचसि मुधा साध्वि शोकस्याविषयं सुतम् । सुतस्तवैष देहो वा जीवो वा ब्रूहि सारतः ॥४७॥**
**त्वग्रक्तमांसास्थिमयो देहोऽयं पुरतस्तव । जीवोऽजः सर्वगोऽनन्तः कोत्र शुग्विषयो वद ॥४८॥**

तापस उवाच। '(हे) साध्वि), किं मुधा शोचसि? सुतं शोकस्य अविषयम्। तव सुतः देहो वा जीवो वा सारतः ब्रूहि।४७। अयं त्वग्+रक्त+मांस+अस्थिमयः देहः तव पुरतः। जीवः अजः सर्वगः अनन्तः। अत्र कः शुग्+विषयः? वद!४८।

तो तापसी म्हणाला, 'हे सती, का उगीच विलाप करते आहेस? हा मुलगा शोकाचे कारण होऊच शकत नाही. मला सांग, तुझा मुलगा हा तुझ्यासमोरचा देह आहे कां त्याला सोडून गेलेला जीव आहे? अगदी विचार करून बघ!४७. हा त्वचा, रक्त, मांस, अस्थी यांचा अन्नमय, प्राणमय आदि सहा कोशांचा बनलेला देह तुझ्यापुढेच आहे. तो तुझ्याजवळच असल्याने त्याचा शोक करण्याचे कांहीच कारण नाही. सहा कोशांच्या पुरचुंडीहून वेगळा असा जीव ज्याच्यामुळे ही जड (अचेतन) पुरचुंडी सचेतनासारखी भासते तो तुझा मुलगा असे म्हणशील तो परमेश्वराचा अंश आहे, जन्ममरणादि विकारशून्य आहे. सर्वव्यापी आहे. तो आत्मा असल्याने ब्रह्मरूपच आहे. आत्म्याच्या दोन अवस्था आहेत. १. व्यवहारविशिष्ट २. केवल. व्यवहारही स्वप्न, जागृती आणि सुषुप्ती असा तीन प्रकारांचा आहे, कैवल्योपनिषदानुसार (१:१३).

१. **सुषुप्ती**त (गाढ निद्रा) तमोगुणाच्या प्रभावाने सर्व उपाधींचा विलय होऊन परमानंदरूप ब्रह्मच होतो. (*'आप्नोति इति आत्मा.'*)

**कालकर्मगुणोत्पन्नं जगन्मायामयं त्विदम् । कथं ध्रुवं हि मन्तव्यं यथा कर्मैन्द्रजालिकम् ।।४९।।**
**कालकर्मगुणाद्युत्थ-देहिनः स्वत्वकल्पना । पुत्रादिरूपा मिथ्यैषा नद्यां काष्ठौघवच्चला ।।५०।।**

इदं मायामयं जगत् तु काल+कर्म+गुण+उत्पन्नं यथा ऐन्द्रजालिकं कर्म, कथं हि ध्रुवं मन्तव्यम्?४९। एषा काल+कर्म+गुण+आदि+उत्थ+देहिनः पुत्र+आदि+रूपा स्वत्व+कल्पना मिथ्या, नद्यां काष्ठ+ओघवत् चला।'५०।

२. वाचा, हात, पाय इत्यादि इंद्रियांचा उपशम झाल्यावर येणाऱ्या **स्वप्न** या अवस्थेत तीत गिरी, नदी, समुद्र, मनुष्य, पशु इत्यादि सर्व लौकिक पदार्थांचा वासनारूप अंश घेऊन, जागृतावस्थेतील अभिमानाचा स्वतःच नाश करून, एक जगतच आपल्या अंतःकरणाने निर्माण करून, आपल्या चैतन्याने त्या कल्पित पदार्थांना रूप देऊन, जागृत अवस्थेतील वासना त्यांत आणणारा तो आत्मा (*'आदत्ते इति आत्मा'*). बृहदारण्यक उपनिषदांत (४:३:९) याचे असे वर्णन केले आहे. स्वप्नावस्थेत जीवात्मा ह्या भौतिक जगांतल्याच सर्व पदार्थांचे अंश घेऊन, आपणच त्या सर्व विस्कटून स्वतःच पुन्हां उभ्या करतो; आणि स्वतःच्याच तेजाने स्वतःच्याच प्रकाशांत स्वप्न पाहतो.

३. **जागृत** अवस्थेत नेत्रादि इंद्रियांच्या माध्यमांतून बाह्य विषयांचा भोग घेतो (*'अत्ति इति आत्मा'*) ही उपाधिविशिष्ट आत्म्याची तिसरी अवस्था आहे. कैवल्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणे तो स्त्री, अन्न, पान इत्यादि विचित्र भोगांनी परितृप्त होतो.'

उपाधिरहित **केवल आत्मा** सतत जाणारा तो आत्मा (*'अतति इति आत्मा'*). हाच ऐतरेय आरण्यांत *'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म'* असा वर्णिलेला आहे. अनंत म्हणजेच देश-काल-वस्तू ह्या परिच्छेदांनी रहित. जीव आणि अनंत ह्या दोन्हींचे एकत्व दर्शवून अजन्मा, सर्वगामी या आधीच्या विशेषणांची पुष्टीच होते. अशा रीतीने देह आणि जीव यांच्यात शोक कुणाचा करतेस ते सांग या प्रश्नांतच नकारार्थी उत्तर अभिप्रेत आहे.४८. श्रीगुरू पुढे सांगत आहेत. हे दृश्य जग त्रिगुणात्मक मायेपासून झालेले आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांना क्षोभवणारा काल आहे. आणि जीवांच्या उत्पत्तीला कारण त्यांचे कर्म असते. असे हे गारुड्याच्या इंद्रजालासारखे जग शाश्वत कसे मानतां येईल?४९. काल, कर्म, गुण यांच्यापासून उद्भवलेल्या ह्या जीवाविषयी जी 'हा माझा मुलगा' अशी आत्मीयता तुला वाटते ती मिथ्या आहे. फसवी आहे. नदीत वाहणाऱ्या लाकडांच्या समूहासारखी अस्थिर आहे.५०.

**त्वया ध्रुवा मतेयं चेद्वद पूर्वापरोद्भवे । कस्य त्वं जननी स्त्रीर्वा के वा सम्बन्धिनस्तव ।।५१।।**
**जन्ममृत्यू कालवशादलङ्घ्यौ दिनरात्रिवत् । शरीरिणोऽङ्गे बाल्यादि यथा देहान्तरं तथा ।।५२।।**
**गुरुप्रसादाद्यततो भ्रमोऽयं लीयतेऽचिरात् । तेनर्ते मृत्यवे कल्प्यो जातो वै जनुषे मृतः ।।५३।।**

इयं त्वया ध्रुवा मता चेत् वद पूर्व+अपर+उद्भवे त्वं कस्य जननी? स्त्रीः वा? के वा ते सम्बन्धिनः?५१। जन्म+मृत्यू कालवशात् दिन+रात्रिवत् अलंघ्यौ। शरीरिणः अङ्गे यथा बाल्यादि तथा देहांतम्।५२। गुरुप्रसादात् यततः अयं भ्रमः अचिरात् लीयते। तेन ऋते जातः वै मृत्यवे कल्प्यः मृतः जनुषे।५३।

तरीही तुला वाटणारी आपुलकी खरी आणि कायमची मानलीस तर मग सांग बरं तू पूर्वीच्या किंवा पुढच्या जन्मी कुणाची आई वा स्त्री होतीस आणि होणार आहेस? कोण कोण तुझे नात्यांतले होते आणि होतील?५१. 'जीवासाठी मी शोक करीत नाही, त्याच्या जन्म-मृत्यूमुळे होणाऱ्या दुःखाने शोक होतो' असे तू म्हणशील तर जसा दिवस संपला की रात्र येते आणि रात्रीनंतर पुन्हा दिवस, तसेच जन्म आणि मृत्यू कालाधीन आहेत. ते टाळतां येत नाहीत. देहाभिमानी जीवाला त्याच्या शरीराच्या बाल्यादि अवस्था नेमलेल्याच असतात (*'देहिनेऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यते।।'* भ.गीता २:१३). 'जो अल्पवयस्क आणि अशक्त असा बालक मी होतो तोच मी प्रौढ आणि बलवान झालो आहे', ही जशी जाणीव असतेच; किंवा नवजात बालकाची पूर्वजन्मीची सर्व स्मृती नष्ट झालेली असूनही स्तन चोखण्याची प्रवृत्ती मात्र असते. तरीही जीवाविषयीची आपुलकी हा अविवेकी लोकांना वाटणारा भ्रमच आहे.५२. सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने जो प्रयत्नशील राहतो त्याचा भ्रम मात्र लवकरच विरून जातो. यततः म्हणजे शेवटच्या श्वासापर्यंत यत्नशील. ब्रह्मसूत्रांतील प्रतिपादनानुसार (४:१:१२) उपासना मृत्यूच्या क्षणापर्यंत चालूं राहिली पाहिजे. मात्र गुरुकृपेशिवाय जन्मला आलेला मृत्यू पावणार आणि मेलेला पुन्हां जन्माला येणार हे अटळ आहे (*'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च। तस्मादपरिहार्येर्थे न त्वं शोचितुमर्हसि।।'* भ.गीता २:२७). 'ह्या जन्मी नाही भ्रम गेला तर नसूं दे; पुढच्या जन्मी जाईल! पुढचा जन्म येणारच आहे की.'

**नार्यतोऽपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि । मृतः शुचा पुनर्नैति नाप्युपायान्तरायुतैः ।।५४।।**

**।। सोवाच ।।**

**न वेदान्तार्थतत्त्वादि रोचते येन मेऽर्पितम् । सुफलं तत्कुतो यातं विश्वस्तव्यः स कैर्भुवि ।।५५।।**

अतो (हे) नारि, त्वं अपरिहार्येर्थे शोचितुं न अर्हसि। मृतः शुचा, उपाय+अंतर+अयुतैः वा पुनः न एति। ५४। सा उवाच। वेदान्त+तत्त्व+अर्थ (मे) न रोचते। येन मे सुफलं अर्पितं तत् कुतः यातम्? सः भुवि कैः विश्वस्तव्यः?५५।

असे कुणी म्हणेल तर ते खरे नाही. आपण केलेल्या कर्माच्या प्रचंड पसाऱ्यांत भोग्य कर्मे किती तरी असतात. त्यांचा भोग भोगण्यासाठी कोट्यवधी अधोयोनि आणि देवादिक ऊर्ध्वयोनीत जीव फिरत असतो. त्या असंख्य फेऱ्यांत क्वचितच मनुष्यदेह लाभतो. असा मनुष्यदेह लाभला तरी त्यांत सगळी इंद्रिये पटु असणे हे विपुल पुण्याची जोड असेल तरच शक्य आहे. गरुडपुराणानुसार (धर्मकांड-प्रेतकल्प १:५) सर्व इंद्रियांनी संपन्न असा देह बहु पुण्यानेच लाभतो. पंगु, अंध इत्यादि देहांत किंवा कोळी, भिल्ल, यवन, म्लेच्छ, इत्यादि वंशांत जन्म आला तर परमार्थाचा गंधही लाभणार नाही. अगदी अधिकारी ब्राह्मण देहही मिळाला तरी मातेच्या कुशीत मल-मूत्र-वात-पित्त-कफादींनी बरबटलेल्या, रेत आणि रक्ताच्या संयोगाने झालेल्या, अशुचि बीजापासून वाढलेल्या, वारेत गुंडाळलेल्या गर्भाची वाढ आईच्या खाण्यापिण्यांत आलेल्या रसांनीच होते. त्याची शक्ती, बल, प्रज्ञा, तेज, हालचाल सर्व कुंठित असतात. मुहूर्तमात्र सहन करायला अशक्य अशा ह्या अवस्थेत दहा महिने अगतिक अवस्थेत पडून राहून योनीद्वारा कष्टप्रद रीतने बाहेर पडायचे. म्हणून पुत्राच्या मृत्यूचा शोक टाकून ज्ञानासाठी यत्नशील असावे हा भावार्थ.५३. म्हणून बाई ग, तूं ह्या पुत्रमृत्यूसारख्या अटळ गोष्टीचा शोक करणे उचित नाही. मेलेला शोकाने, विलापाने किंवा इतर हजारो उपायांनीही परत येत नाही.५४. ब्राह्मणी म्हणाली, हा सगळा वेदांत आणि तत्त्वज्ञान माझ्या गळी उतरत नाही. ज्या दत्तगुरूंनी मला हे सुफल दिलं ते असं कसं गेलं? आतां त्यांच्यावर कोण विश्वास ठेवील?५५.

**।। साधुरुवाच ।।**

**यत्र त्वया वरो लब्धस्तत्र गत्वा सविस्तरम् । वरदं परिपृच्छेदं यास्येऽलं विस्तरेण भोः ।।५६।।**
**तच्छ्रुत्वा शवमादाय सद्गुरोराश्रमं ययौ । तत्र पादुकयोः शीर्षं ताडयामास भामिनी ।।५७।।**

साधुः उवाच। भोः, यत्र त्वया वरः लब्धः तत्र गत्वा वरदं इदं सविस्तरं परिपृच्छ। विस्तरेण अलम्।५६। तत् श्रुत्वा शवं आदाय सद्गुरोः आश्रमं ययौ। तत्र भामिनी पादुकयोः शीर्षं ताडयामास।५७।

तेव्हां तो साधू म्हणाला, जिथे तुला पुत्रप्राप्तीचा वर मिळाला तिथे जाऊन वर देणाऱ्या हरीलाच तूं हे सर्व विचार. मी आतां अधिक कांही न बोलतां जातो.५६. ते त्या साधूचे बोलणे ऐकून ती सती आपल्या पुत्राचे ते शव घेऊन सद्गुरूंच्या मंदिराला गेली. शोक आणि संतापाने तापलेल्या त्या स्त्रीने तिथे पादुकांवर डोके आपटून घेतले.५७. अशा प्रकारे तिने संध्याकाळपासून रात्रीपर्यंत शोक केला आणि अंत्यसंस्कारासाठी ते प्रेत दिले नाही. त्यामुळे वाट पाहून ब्राह्मण घरी गेले. ते दोघे पती-पत्नी मात्र तिथेच राहिले.५८.

**प्राण -** थोड्या वेळाने रात्री तिला झोप लागली. स्वप्नांत तिला श्रीगुरूंचे दर्शन झाले. ते तिला म्हणाले, 'बाई, मी काय तुझे काय अहित केले आहे?' 'तो' (**सः**) असा वेदांनी अपरोक्षत्वाने निर्देशिलेला वायू म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदानुसार (३;७:२) सर्वज्ञत्वादि स्वरूपलक्षणयुक्त अंतर्यामी, सर्व जीव आणि जग यांच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचे कारण असणारा ईश्वर होय. 'हा' (**एष**) शब्दाने अपरोक्ष, स्वयंप्रकाश प्रत्यगात्मा (जीवात्मा) म्हणजेच प्राण. प्राण हा शब्द अन ह्या चलनार्थी धातूपासून झालेला आहे. तो कसा आत्मा होईल? या आक्षेपाला छांदोग्य उपनिषदाच्या सातव्या अध्यायांत सनत्कुमारांनी नारदाला केलेल्या उपदेशाचा आधार घेतला आहे. नामापासून सुरुवात करून क्रमाक्रमाने वाग्, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप, तेज, आकाश, स्मृती आणि आशा

**एवं निशीथादासायं शुशोच न ददौ शवम् । संस्कर्तुं स्वालयं विप्रा जग्मुस्तत्रैव दम्पती ।।५८।।**
**ततो निशीथे सुष्वाप साध्वी स्वप्ने ददर्श सा । श्रीगुरुं प्राह सोऽप्येनां किं मयापकृतं हि ते ।।५९।।**

एवं आसायं निशीथात् शुशोच। शवं संस्कर्तुं न ददौ। विप्राः स्व+आलयं जग्मुः। दम्पती तत्र एव तस्थुः।५८। ततः निशीथे साध्वी सुष्वाप। सा स्वप्ने श्रीगुरुं ददर्श। सः अपि एनां प्राह, मया ते किं अपकृतं हि।५९।

हे उत्तरोत्तर कार्यकारणभावाने तसेच निमित्तनैमित्तिकभावाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत असे सांगून अंती आशेपेक्षांही प्राण श्रेष्ठ आहे असे सोदाहरण प्रतिपादन केले आहे. सर्व क्रिया, कारक, फल, भेद हे प्राणच आहेत हे सांगतांना, प्राणच प्राणाने चालतो, प्राणच प्राण देतो, प्राणच प्राणाला देतो; पिता प्राण, माता प्राण, भ्राता प्राण, बहीण प्राण, प्राणच आचार्य, प्राणाच्या व्यतिरिक्त कांहीच नाही असे स्पष्ट करण्यासाठी तिथे पुढे म्हटले आहे की 'आई, वडील, भाऊ, बहीण, गुरु इत्यादींचे प्राण असतील तर त्यांना दुरुत्तरे करणाऱ्याचा लोक पितृघाती, मातृघाती, गुरुघाता इत्यादि विशेषणांनी धिक्कार करतात. परंतु त्याच मातापितरादींना प्राण सोडून गेल्यावर त्यांना जाळून टाकणाऱ्याला मात्र मातृघातकी, पितृघातकी असे धिक्कार ऐकावे लागत नाहीत.' अशा रीतीने, 'प्राणच हे सर्व कांही आहे,' हे पाहणारा, विचार करणारा, समजून घेणारा अतिवादी - सर्वश्रेष्ठ तत्त्व जाणणारा होतो.

इथे कुणी असा आक्षेप घेईल की शंकराचार्यांनी शतश्लोकींत (२८) प्रतिपादल्याप्रमाणे जन्माच्या वेळी आत्मा येत नाही किंवा मृत्यूच्या वेळी जात नाही, तो अखण्ड असतो; (*'नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यन्तकाले यत्सोऽखण्डोऽस्ति लैङ्गं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक्। तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किन्तु*

**प्राणो नामैष वायुः स बहिर्यातो मुहुर्मया । आनीय पूर्ववन्न्यस्तस्त्यजातः शुचमङ्गने ।।६०।।**

एष प्राणः नाम वायुः सः बहिः यातः। स मया मुहुः आनीय पूर्ववत् न्यस्तः। अतः, हे अङ्गने, शुचं त्यज।६०।

*संस्कारजातैः तेजोमात्री गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैस्सहैव।।२८।।'*) येणे-जाणे इत्यादि लिङ्गदेहापुरते असते. तर मग प्रत्यगात्मा आला किंवा गेला असे कसे म्हणतां येईल? प्रश्नोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार रथचक्राच्या अरा जशा नाभीशी जुडलेल्या असतात तसेच ह्या इंद्रिये, मन आदी यांचा संघात असलेल्या देहांत प्रज्ञात्मा प्रवेश करून त्या सर्वांच्या नामरूपांची अभिव्यक्ती करतो. हा अनुप्रवेश आरशांत होणाऱ्या बिंबाच्या प्रवेशासारखा असतो. ते प्रतिबिंब आणि बिंब जसे एकरूप असतात तसेच जीव आणि आत्मा जाणावेत. हा जीवाविना सर्व मृत होतात; पण जीव कधीच मरत नाही (छां.उ. ६:११:३). ज्या जीवाच्या वियोगाने मृत्यू होतो त्यालाच तो जीव म्हणजे प्राण बाहेर गेला असे श्रीगुरू म्हणतात. 'तो गेलेला प्राण मी आणून पूर्ववत् जागच्या जागी ठेवला आहे. आतां तो मृत नाही. तेव्हां आतां तूं शोक सोड.' असे श्रीगुरू त्या सतीला म्हणाले. इथे गेलेले प्राण परत आणण्याविषयी सुबंधूचे प्राण त्याच्या भावांनी परत आणले तो दृष्टांत दिलेला आहे (शतश्लोकी २९). वाचा नसली तरी तो मुका म्हणून जिवंतच असतो. डोळे नसतील तर तो आंधळा झाला तरी जिवंतच असतो. कान गेलेला बहिरा जिवंतच असतो. इतकेच काय मन नसले तरी वेडा जिवंतच असतो. पण जीवा(प्राणा)शिवाय कुणी जिवंत असूं शकत नाही ह्या कौषीतकी उपनिषदाचे (३:३) वचन इथे उद्धृत केले आहे.६०.

**इति दृष्ट्वा विनिद्राऽभूद् ददर्शोत्थितमात्मजम् । हर्षशोकान्विता साध्वी प्रेम्णा भर्तारमाह्वयत् ।।६१।।**
**सोऽप्युत्थायात्मजं दृष्ट्वा रुदन्तं क्षुत्तृडाकुलम् । मन्त्रवत् त्रिरवघ्राय मूर्ध्नर्यस्तौषीत्परात्परम् ।।६२।।**
**अत्रान्तरे प्रातरभूद् दग्धुं प्रापुः शवं द्विजाः । ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा सर्वं श्रुत्वाऽस्तुवन्हरिम् ।।६३।।**
**दम्पती तु ततः स्नात्वा प्रपूज्येशं सुविस्तरात् । नीराज्याभ्यर्च्य भूदेवान्जग्मतुर्निजमन्दिरम् ।।६४।।**
**विद्याविनयसंपन्नश्चिरजीवी स भाग्यभाक् । बभूवाप्येवमेवान्य आसन्पूर्णमनोरथाः ।।६५।।**

इति (स्वप्नं) दृष्ट्वा (सा) विनिद्रा अभूत्। उत्थितं आत्मजं ददर्श। हर्ष+शोक+अन्विता साध्वी प्रेम्णा भर्तारं आह्वयत्।६१। सः अपि उत्थाय रुदन्तं क्षुत्+तृड्+आकुलं आत्मजं दृष्ट्वा मूर्ध्निः मन्त्रवत् त्रिः अवघ्राय परात्परं अस्तौषीत्।६२। अत्र अंतरे प्रातः अभूत्। द्विजाः शवं दग्धुं प्रापुः। ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा, सर्वं श्रुत्वा हरिं अस्तुवन्।६३। ततः दम्पती तु स्नात्वा ईशं सुविस्तरात् प्रपूज्य नीराज्य भूदेवान् अभ्यर्च्य निजमन्दिरं जग्मुः।६४। सः विद्या+विनय+संपन्नः चिरजीवी भाग्यभाक् बभूव। अन्ये अपि एवं एव पूर्णमनोरथाः आसन्।६५।

असे सर्व स्वप्नांत पाहून ती साध्वी जागी होऊन पाहते तर तिचा मुलगा उठून बसला होता. ते पाहून तिच्या मनांतल्या शोकाची जागा आनंदाने घेतली. ओठांवर हसू आणि डोळ्यांत पाणी अशी कांहीशी तिची अवस्था झाली. तिने प्रेमाने आपल्या हांक मारली.६१. तिच्या पतीनेही उठून आपल्या भुकेने आणि तहानेने व्याकुळ होऊन रडणाऱ्या मुलाला पाहून जवळ घेतले आणि त्याच्या डोक्याचे मंत्राने अवघ्राण केले आणि परमेश्वराची स्तुती केली.६२. थोड्या वेळाने सकाळ झाली आणि गांवातील ब्राह्मणवर्ग मुलाचे शव दहन करण्यासाठी आले. तेव्हां मलगा जिवंत झालेला पाहून आणि सर्व वृत्तांत ऐकून त्यांनीही भगवंताची स्तुती आरंभिली.६३. त्यानंतर त्या जोडप्याने श्रीगुरूंच्या पादुकांची सविस्तर पूजा करून आरती केली, ब्राह्मणांची पूजा करून आणि त्यांना भोजन घातले. नंतर सर्वजण आपापल्या घरी परतले.६४. तो पुनरुज्जीवित पुत्र विद्या आणि विनयांनी संपन्न, दीर्घजीवी आणि भाग्यवंत झाला. दुसरेही अनेक भक्त याचप्रमाणे श्रीगुरूंच्या कृपेने आपल्या कामना पूर्ण करून घेऊन सुखी झाले.६५.

**तत्राऽश्रान्तं स जागर्ति श्रीनृसिंहसरस्वती । अद्य कालान्तरेऽप्येवं न निद्रात्यन्यवत्कलौ ।।६६।।**
**तत्रेशमाद्यं दृढभक्तियुक्ता भजन्ति ये केऽपि सदुक्तिसक्ताः**
**ते प्राप्नुवन्ति द्रुतमिष्टकामान्निदर्शनं त्वत्र सती सुकामा ।।१।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे प्रेतसंजीवनं नाम द्वादशोऽध्यायः ।।१२।।**

तत्र सः श्रीनृसिंहसरस्वती कालान्तरे अद्य अपि अश्रान्तं जागर्ति। कलौ अन्यवत् न निद्राति।६६। तत्र आद्यं ईशं ये के अपि सत्+उक्ति+सक्ताः दृढ+भक्ति+युक्ताः भजन्ति ते द्रुतं इष्ट+कामान् प्राप्नुवन्ति। अत्र निदर्शनं तु सुकामा सती।१।

त्या कृष्णातीरावर औदुंबराच्या छायी तो भक्तकामकल्पद्रुम श्रीनृसिंहसरस्वती श्रीगुरू, शेकडो वर्षांचा काळ लोटूनही आजही अविश्रांत जागतो आहे. कलियुगांतही अन्य देवतांप्रमाणे तो झोप घेत नाही.६६. (क्षेपक) जे कुणी संतांच्या वचनावर विश्वास ठेवून त्या पादुकांची दृढ भक्तीने उपासना करतात त्यांच्या ईप्सित कामना शीघ्रच पूर्ण होतात. इष्टार्थ पावलेली ती शिरोळची सती हे त्याचे एक उदाहरण आहे.१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा बारावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# त्रयोदशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**आसाद्य भगवान्भीमां ततः किमकरोत्प्रभुः । श्रद्दधानाय मे शंस दुर्ग्रहं तस्य चेष्टितम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गान्धर्वनगरे भीमामरजा संगमे शुभे । कृष्णापञ्चनदीयोग-तुल्ये तस्थौ जगत्प्रभुः ।।२।।**

**स्थित्वात्र गुप्तभावेन तत्रत्यब्राह्मणालयम् । गत्वा भिक्षां ययाचेऽसौ भक्तोद्धरणहेतवे ।।३।।**

नामधारक उवाच। भगवान् भीमां आसाद्य ततः प्रभुः किं अकरोत्? दुर्ग्रहं (अपि) तस्य चेष्टितं श्रद्दधानाय मे शंस।१। सिद्ध उवाच। कृष्णा+पंचनदी+योग+तुल्ये शुभे भीमा+अमरजा सङ्गमे गान्धर्वनगरे जगत्+प्रभुः तस्थौ।२। अत्र गुप्तभावाने स्थित्वा तत्रत्य+ब्राह्मण+आलयं गत्वा असौ भक्त+उद्धरण+हेतवे भिक्षां ययाचे।३।

**श्रीगणेशाय नमः। तेराव्यांत वांझ महिषी दुभवुनि घेई राजाची सेवा। ब्रह्मराक्षसा देउनि सद्गति दाविति सद्गुरु विश्वरूप यतीला।।** अशा रीतीने मागील अध्यायात तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच श्रीगुरूंचे भक्तवात्सल्यही दर्शविले. आता आपल्या आचरणांतून रागद्वेषरहित जीवन्मुक्त जगाला कसे पावन करतात ते दाखवून रागद्वेष न सुटलेला, जरी तो संन्यासी असला तरी, कृतार्थ होत नाही हे दाखविले आहे. नामधारक सिद्धमुनींना विचारतात, भगवान दत्तप्रभूंनी भीमातीराला येऊन काय लीला केली? खरोखर त्यांची लीला सामान्य मानवी बुद्धीला आकलन होण्यास कठीण आहे. तरीही श्रद्धेमुळे ती जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.१. सिद्ध मुनी उत्तरले, कृष्णा-पंचगंगा संगामासारख्याच पावन अशा भीमा-अमरजा संगमासन्निध गाणगापूरला सद्गुरूंनी वास केला.२. आपले माहात्म्य प्रकट न करतां तिथे संगमावरच राहून गाणगापूरांतल्या ब्राह्मणांच्या घरी भक्तांच्या उद्धारासाठीच ते भिक्षा मागीत असत, भूक शमविण्यासाठी नव्हे. कारण त्यांना तहान-भूक इत्यादि विकार नसतात.३.

**दीनभाविकसद्विप्र-दत्तभिक्षाप्रियं द्विजाः । श्रीविद्याढ्या हसन्ति स्म श्रीशं भक्तिप्रियं हरिम् ।।४।।**
**यथार्के प्रसरत्यभ्र-च्छन्नेऽपि द्योत इद्यथा । सम्पुटस्थितकस्तूरी-गन्धस्तद्वद्धरेर्गुणाः ।।५।।**
**एकदा दीनविप्रस्य गेहे च्युतरदां वशाम् । महिषीं प्रेक्ष्य स प्राह ब्राह्मणीं देहि मे पयः ।।६।।**
**सा प्राहेयं वशा भार-वाहिनी नासिकागुणा । योगक्षेममितोऽस्माकं जन्मतोऽपि लुलायवत् ।।७।।**
**मृषा मा वद तां दुग्ध्वा क्षीरं देहीति भाषिता । गुरुणापि वशां दुग्ध्वा काष्ठपात्रेऽलभत्पयः ।।८।।**

दीन+भाविक+सत्+विप्र+दत्त+भिक्षा+प्रियं श्री+ईशं भक्ति+प्रियं हरिं श्री+विद्या+आढ्याः द्विजाः हसन्ति स्म।४। अर्के अभ्र+च्छन्ने अपि यथा द्योत प्रसरति, (यथा वा) सम्पुट+स्थित+कस्तूरी+गंधः इत् तत्+वत् हरेः गुणाः प्रसरन्ति।५। एकदा दीन+विप्रस्य गेहे च्युत+रदां वशां महिषीं प्रेक्ष्य सः ब्राह्मणीं प्राह, मे पयः देही।६। सा प्राह, 'इयं वशा, भारवाहिनी, नासिका+गुणा। जन्मतः अपि लुलायवत्। इतो अस्माकं योगक्षेमम्।'७। 'मृषा मा वद। तां दुग्ध्वा क्षीरं देहि' इति गुरुणा भाषिता वशां अपि दुग्ध्वा काष्ठ+पात्रे पयः अलभत्।८।

लीन, भाविक आणि सदाचारी ब्राह्मणांचीच भिक्षा आवडीने घेणाऱ्या भक्तीचा चाहता अशा त्या लक्ष्मीपती हरीचा गाणगापुरांतील धनवान आणि सुविद्य आणि म्हणूनच गर्विष्ठ असलेले ब्राह्मण कुचेष्टेने उपहास करीत.४. ढगांनी आच्छादलेल्याही सूर्याचा प्रकाश जसा फांकतो, किंवा बंद डबीतील कस्तूरीचासुद्धां सुगंध दरवळतोच त्याचप्रमाणे श्रीगुरूंचे गुणही लवकरच प्रकट झाले.५. एकदा अशाच एका गरीब ब्राह्मणाच्या घरी श्रीगुरू भिक्षेला गेले असतां अन्न तयार नसल्याचे पाहून त्यांनी ब्राह्मणीला भिक्षेसाठी दाराजवळच बांधलेल्या, दांत पडलेल्या वांझ म्हशीची धार काढून दूध द्यायला सांगितले.६. ती गृहिणी म्हणाली 'अहो, ही वांझ म्हैस आहे. जन्मापासूनच आम्ही हिला रेड्यासारखी पोसली आहे. नाकांत वेसण घालून हिला ओझे वाहण्याच्या कामाला देतो. त्यावरच आमचा चरितार्थ चालतो.'७. त्यावर श्रीगुरू म्हणाले, 'उगीच खोटे बोलूं नकोस, (लवकर) तिची धार काढून मला दूध दे!' हे श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्या ब्राह्मणीने त्या वांझ म्हशीचीच धार काढायला घेतली. तो काय आश्चर्य, ते लाकडी भांडे दुधाने भरले!८.

**विस्मिता सार्पयत्तस्मै कोष्णं कृत्वा पयो मुदा । पीत्वा क्षीरं ययौ प्रेम्णा श्रीगुरुः संगमं द्रुतम् ।।९।।**
**तत एत्य गृहेशोऽदः श्रुत्वा सस्त्रीक एत्य तम् । गुरुं संपूज्य लब्धेष्ट-वरो हृष्टोऽन्वगाद्गृहम् ।।१०।।**
**अन्येद्युर्भारवाहार्थं वशामाहर्तुमागताः । कृषीवलाः प्रेक्ष्य दोहं शशंसुर्द्राङ् नृपाय तत् ।।११।।**
**नृपोऽप्याकर्ण्य विप्रात्तच्चतुरङ्गबलान्वितः । गुर्वर्थं राजचिह्नानि गृहीत्वा सङ्गमं ययौ ।।१२।।**
**तमेत्य प्रणिपत्योचे दण्डवद्गद्गदाक्षरः । पुलकाङ्कितदेहो राड् दीनं माम्पाहि किङ्करम् ।।१३।।**

सा विस्मिता पयः कोष्णं कृत्वा मुदा तस्मै अर्पयत्। श्रीगुरुः प्रेम्णा क्षीरं पीत्वा द्रुतं संगमं ययौ।९। ततः गृह+ईशः एत्य अदः श्रुत्वा गुरुं एत्य तं संपूज्य लब्ध+इष्ट+वरः हृष्टः गृहं अन्वगात्।१०। अन्ये द्युः भारवाहार्थं वशां आहर्तुं आगताः कृषीवलाः दोहं प्रेक्ष्य तत् द्राक् नृपाय तत् शशंसुः।११। नृपः अपि विप्रात् तत् आकर्ण्य चतुः+अंग+बल+अन्वितः गुरु+अर्थं राज+चिह्नानि गृहीत्वा संगमं ययौ।१२। तं एत्य दण्डवत् प्रणिपत्य गद्गद+अक्षरः पुलकाङ्कित+देहः राट् ऊचे, 'मां किङ्करं पाहि।'१३।

आश्चर्यचकित झालेल्या त्या स्त्रीने ते दूध किंचित् गरम करून श्रीगुरूंना दिले. त्यांनीही अत्यंत प्रेमाने ते पिऊन टाकले आणि लगेच ते संगमाकडे निघून गेले.९. कांही काळाने गृहस्वामी परतले आणि ही सर्व घटना पत्नीकडून ऐकली. लगेच तिला घेऊन ते संगमावर गेले आणि त्यांनी श्रीगुरूंची उत्तम प्रकारे पूजा केली. सद्गुरूंनी प्रसन्न होऊन त्यांना ईप्सित वर दिला आणि आनंदभरित होऊन ते दंपती आपल्या घरी परतले.१०. दुसऱ्या दिवशी कांही शेतकरी ओझे वाहण्यासाठी ती म्हैस घेऊन जायला आले असतां त्यांनी ती दुभती झाल्याचे पाहिले. ते ताबडतोब राजाकडे गेले आणि त्याला हा चमत्कार निवेदन केला.११. राजानेही ब्राह्मणाकडून सर्व खातरजमा करून घेतली आणि आपली चतुरंग सेना बरोबर घेऊन, श्रीगुरूंसाठी पालखी, छत्र-चामरादि राजचिह्ने घेऊन संगमावर आला.१२. ह्या भगवल्लीलेचे श्रवण करून त्या शुद्ध अंतःकरणाच्या राजाचा भक्तिभाव उफाळून आला आणि तो नम्रपणे त्यांच्याकडे आला. श्रीगुरूंजवळ येऊन राजाने दण्डवत घातला. त्याचे अष्ट सात्त्विक भाव उचंबळून आले. रोमांचित होऊन तो सद्गदित आवाजांत म्हणाला, 'ह्या दासाला पदरांत घ्या!'१३.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**दण्डी वनचरोऽस्म्यङ्ग भिक्षुस्त्वं सेनया सह । राजन्कस्मादिहानन्द-संरम्भादागतोऽसि किम् ।।१४।।**

**।। राजोवाच ।।**

**भवान्मायानरो भिक्षुर्नैवास्ति परमेश्वर । हित्वारण्यविहारं भो पावनं कुरु मे पुरम् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) अङ्ग! (अहं) दण्डी वनचरः भिक्षुः अस्मि। (हे) राजन्, इह आनंद+संरम्भात् कस्मात् आगतः असि? किम् (कार्यम्)?'१४. राजा उवाच। '(हे) परमेश्वर, भवान् माया+नरः अस्ति। नैव भिक्षुः। भो, अरण्य+विहारं हित्वा मे पुरं पावनं कुरु।'१५।

श्रीगुरूंनी विचारले, 'अरे राजा, मी तर एक वनवासी, दंडधारी संन्यासी आहे. राजेसाहब, इतक्या आनंदाने आणि समारंभपूर्वक कशासाठी येणे केले? आपले माझ्याकडे काय काम आहे?'१४. राजा म्हणाला, 'भगवंता, आपण मानुष रूप घेतले असले तरी ते आपले खरे स्वरूप नाही. आपण सामान्य संन्यासी तर मुळीच नाहीत. आपण स्वीकारलेला हा वनविहार सोडून माझ्या नगरीत वास करून तिला पावन करावे.' **पुरं** या शब्दाचा दुसरा अर्थ हे मानवी शरीर असाही होतो. याला डोक्यावर सात (डोळे, कान, नाकपुड्या आणि मुख) आणि खाली बेंबीसहित समोरची तीन आणि टाळू अशी अकरा दारे आहेत; दिशा, वायू इत्यादि द्वारपाल आहेत; त्वचा, मांस, रक्त, मेद (चरबी), अस्थी व स्नायू हे प्राकार (दालने) आहेत; मूलाधारापासून आज्ञा पर्यंतची चक्रे ह्या अट्टालिका (galleries) आहेत; रोमरूपी वृक्षांनी त्याचा परिसर बहरलेला आहे; आणि सप्त धातूंनी ते पुरेपूर भरलेले आहे. कठोपनिषदांत (२:२:१) एकादश दारांचे नगर असे म्हटलेलेच आहे. श्रीमद्भगवद्गीतेतही (५:१३) 'नवद्वारे पुरे' असा उल्लेख आहे. हे माझे शरीर मलमूत्रादींनी अपवित्र असले तरी तेच आत्मज्ञानाचे एकमेव साधन असल्याने, आपण ते पावन करावे म्हणजेच आत्मज्ञानाला योग्य करावे, असा त्या राजाच्या प्रार्थनेचा भाव आहे.१५.

**इत्थं श्रुत्वा सकारुण्यमुदारं वाक्यमच्युतः । तथेत्युक्त्वाऽऽययौ प्रेम्णा पुरं पावनपावनः ॥१६॥**
**भेजे छत्रप्रकीर्णै राट् पादचारी सुखासने । उपवेश्य गुरुं विप्र-वाहिते तूर्यनिःस्वनैः ॥१७॥**
**वेदघोषं द्विजाश्चक्रुर्मागधाः स्तोत्रमुत्तमम् । जयघोषं तथाप्यन्य एवं गोपुरमागतः ॥१८॥**
**गुरुः प्रत्यक्पथं पुर्या एत्वाऽश्वत्थे भयङ्करम्। स ब्रह्मराक्षसं शक्रं ददर्शातीन्द्रियः प्रभुः ॥१९॥**
**तद्दर्शनान्नराद्भूत्वा प्रशान्तो ह्यवरुह्य सः । गुरुं नत्वोद्धर हरे कुयोनेर्मेत्युवाच तम् ॥२०॥**

इत्थं सकारुण्यं उदारं वाक्यं श्रुत्वा पावनपावनः अच्युतः 'तथा' इति उक्त्वा पुरं आययौ।१६। राट् (स्वयं) पादचारी गुरुं विप्र+वाहिते सुखासने उपविश्य छत्र+प्रकीर्णैः भेजे।१७। द्विजाः वेदघोषं चक्रुः, मागधाः उत्तमं स्तोत्रं (चक्रुः), तथा अन्ये अपि जयघोषं चक्रुः। एवं गोपुरं आगतः।१८। गुरुः प्रत्यक्+पथं पुर्या एत्वा सः अतीन्द्रियः प्रभुः अश्वत्थे भयङ्करं शक्रं ब्रह्मराक्षसं ददर्श।१९। तत्+दर्शनात् सः प्रशांतः भूत्वा नरात् अवरुह्य गुरुं नत्वा तं उवाच, '(हे) हरे मे कुयोनेः उद्धर', इति।२०।

हे त्याचे काकुळतीचे पण प्रौढ बोलणे ऐकून अग्नी, वायू, सोम, सूर्य, इन्द्र इत्यादि पावन देवतांनाही पावन करणारे अच्युत श्रीगुरु 'ठीक आहे,' असे म्हणून नगराकडे निघाले.१६. स्वतः पायउतार होऊन राजाने श्रीगुरूंना ब्राह्मणांनी वाहिलेल्या पालखीत बसविले आणि त्यांच्यावर छत्र-चामर धरून, मंगलवाद्यांच्या गजरांत नगराकडे आणले.१७. ब्रह्मवृंद वेदमंत्रांचा घोष करीत होते, भाट उत्तम स्तवनांनी स्तुती करीत होते आणि इतरही सगळे श्रीगुरूंचा जयजयकार करीत होते. अशा रीतीने ती मिरवणूक गांवाच्या वेशीजवळ आली.१८. श्रीगुरूंनी पश्चिमेकडील वाटेने नगरांत प्रवेश करतांच त्यांना समोरच्या पिंपळावर एक भयानक आणि घातक ब्रह्मराक्षस दिसला. **अतींद्रिय** या विशेषणाने श्रीगुरूंचे इंद्रियातीत विषयांचे ज्ञान सूचित केले आहे. तसेच **प्रभुः** या विशेषणाने त्यांचे निग्रहानुग्रह सामर्थ्यही सूचित केले आहे.१९. त्या श्रीगुरूंच्या दर्शनाने तो राक्षस एकदम शांत झाला. पिंपळावरून उतरून श्रीगुरूंना नमस्कार करून तो म्हणाला, 'हे हरी, या कुत्सित योनींतून मला मुक्त करा.'२०.

**करस्तन्मूर्ध्नि विन्यस्तो गुरुणाथाभवन्नृवत् । तमाह संगमस्नानाच्छीघ्रं मुक्तो भविष्यसि ।।२१।।**
**इति श्रुत्वा नमस्कृत्य गुरुं स्नात्वा स संगमे । विहाय भौतिकं कायं मुमुचे कर्मबन्धनात् ।।२२।।**
**दृष्ट्वेदं राडभिष्टूय तस्मा आम्रेडितोक्तिभिः । पुरं नीत्वा सुमठिकां निर्मायास्मा उपानयत् ।।२३।।**
**खेदं विनयते स्मेश-पूजारार्तिकगायनैः । घोरं सांसारिकं प्रेम्णा नित्यं तदनुगो नृपः ।।२४।।**

गुरुणा तत्+मूर्ध्नि करं विन्यस्तः। अथ स नृवत् अभवत्। तं (श्रीगुरुः) आह, 'संगम+स्नानात् शीघ्रं मुक्तः भविष्यसि।'२१। इति श्रुत्वा सः गुरुं नत्वा, संगमे स्नात्वा, भौतिकं कायं विहाय कर्म+बंधनात् मुमुचे।२२। इदं दृष्ट्वा राट् तस्मै आम्र+ईडित+उक्तिभिः अभिष्टूय पुरं नीत्वा सुमठिकां निर्माय अस्मै उपानयत्।२३। सः संगमे आह्निकं, ग्रामे भिक्षां, मठे निवसतिं कृत्वा भगवान् भक्त+वात्सल्यात् राण्+निघ्नः अभूत्।२४।

श्रीगुरूंनी त्याच्या मस्तकावर हात ठेवतांच त्याचा देह मानवसदृश झाला. त्याला श्रीगुरू म्हणाले, 'संगमात स्नान केलेस की लगेच तूं मुक्त होशील.'२१. हे श्रीगुरूंचे शब्द कानांवर पडतांच तो त्यांना नमस्कार करून संगमावर गेला. तिथे स्नान करून त्याने पांचभौतिक देहाचा त्याग केला आणि तो कर्मबंधनांतून मुक्त झाला.२२. हा सर्व चमत्कार पाहून राजाने पुनःपुनः स्तुतिवचनांनी त्यांचा गौरव केला आणि त्यांना गाणगापुरांत घेऊन गेला. तिथे त्याने एक सुंदरशी मठी बांधून ती श्रीगुरूंना राहण्यासाठी अर्पण केली.२३. ते श्रीगुरू संन्यासाश्रमाला उचित असे शौच, स्नान, दंडतर्पण, ॐकाराचा जप, भिक्षा, ध्यान इत्यादि आह्निक संगमावर करीत; भिक्षेसाठी गांवांत येत; आणि मठांत निवास करीत. ज्ञानी पुरुषांनीसुद्धां लोकसंग्रहासाठी नित्यकर्माचे अनुष्ठान करावे ह्या सत्संप्रदायाचा धडाच ते स्वतःच्या आचरणांतून घालून देत होते. भक्तवत्सल प्रभू राजाचा भाव पाहून त्याच्या अधीन राहत. त्याच्या इच्छेनुसार वागत.२४.

**आह्निकं संगमे भिक्षां ग्रामे निवसतिं मठे । स कृत्वा भक्तवात्सल्याद्राण्निघ्नो भगवानभूत् ॥२५॥**
**श्रुत्वाऽऽश्रमानर्हचेष्टामस्यामंस्ताल्पधीर्यतिः । भ्रष्टोऽयं दाम्भिक इति तं त्रिविक्रमभारती ॥२६॥**
**तज्ज्ञात्वाशेषहृत्संस्थः सर्वसाक्षी जगत्प्रभुः । भूपं प्राहाद्य गन्तव्यं निन्दकार्दनहेतवे ॥२७॥**
**मन्निन्दकोऽस्ति कुमसी-ग्रामे भिक्षुस्त्रिविक्रमः । इति श्रुत्वा नृपो हृष्टो गमनायोपचक्रमे ॥२८॥**

नृपः ईश+पूजा+आरार्तिक+गायनैः घोरं सांसारिकं खेदं विनयते स्म प्रेम्णा नित्यं तत्+अनुगः (अभूत्)।२५। आश्रम+अनर्ह+चेष्टा श्रुत्वा अल्पधीः त्रिविक्रमभारती यतिः अयं भ्रष्टः दाम्भिकः इति अमंस्त।२६। अशेष+हृत्+संस्थः सर्वसाक्षी जगत्+प्रभुः तत् ज्ञात्वा भूपं प्राह, निंदक+अर्दन+हेतवे गन्तव्यम्।२७। कुमसी+ग्रामे त्रिविक्रमः भिक्षुः मत्+निंदकः अस्ति। इति श्रुत्वा हृष्टः नृपः गमनाय उपचक्रमे।२८।

राजा नित्यनेमाने श्रीगुरूंची पूजा, आरती आणि भजन करून आपल्या घोर प्रापंचिक दुःखांचे उपशमन करू लागला आणि प्रेमभक्तीपूर्वक त्यांचा अनुचर होऊन राहिला. साध्या गायनाच्या श्रवणानेही श्रोता तल्लीन होऊन आपल्या शारीरिक दुःखाचा ठणका कांही काळ तरी विसरतो. मग ईश्वराच्या पूजा, आरती आणि भजनानेही विद्यमान त्रिविध सांसारिक तापांचे शमन होतेच यांत काय आश्चर्य?२५. श्रीगुरूंच्या ह्या संन्यासाश्रमाला अनुचित अशा वर्तनाने जवळच कुमसी गांवात राहणाऱ्या त्रिविक्रमभारती नांवाच्या संन्याशाने, अल्पबुद्धीने श्रीगुरूंविषयी, ‘ हा भ्रष्ट आणि दांभिक संन्यासी आहे,’ असा समज करून घेतला.२६. त्या त्रिविक्रमभारतीच्या मनांतला हा किंतु सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी जगदीशच असलेल्या श्रीगुरूंपासून लपून राहिला नाही. ते राजाला म्हणाले, ‘आपल्याला एका निंदकाला धडा शिकविण्यासाठी जायचे आहे.’२७. ‘कुमसी गांवी त्रिविक्रम नांवाचा संन्यासी माझी निंदा करतो.’ हे ऐकून सद्गुरूंच्या सेवेची संधी मिळाल्याने आनंदित होऊन राजाने जाण्याची सर्व तयारी केली. इथे राजा कदाचित् ‘आपण कशाला कष्ट घेतां? मीच त्या निंदकाला शिक्षा करतो,’ असे म्हणेल यासाठी तो निंदक संन्यासी आहे हे श्रीगुरूंनी स्पष्ट केले आहे. संन्याशाला, तो अपराधी असला तरी, दंड करण्याचा अधिकार राजाला नाही हे सूचित केले आहे.२८.

**सुपालके तूपवेश्य नृपचिह्नैः परिष्कृतम् । श्रीगुरुं कुमसीग्रामं निन्ये राड् यत्र भारती ।।२९।।**
**नृसिंहध्याननिष्ठोऽपि स तदा योगिमायया । सम्भूय चञ्चलमना आजह्वे स्तोतुमीश्वरम् ।।३०।।**
**सुप्रसन्न नृसिंहेश दयाब्धे भक्तभावन । कस्मात्तेऽद्य न सामीप्यं ध्याने स्तोष्ये दयस्व भोः ।।३१।।**
**स्तुत्वैवं स नदीतीरे ध्यानाज्ज्ञात्वा स्थितं विभुम् । त्रस्तचित्तोऽभ्यगाद् द्रष्टुमचिन्त्याव्यक्तविग्रहम् ।।३२।।**
**त्रिविक्रमो जवेनैत्य योगिमायावृतान्तरः । उच्चावचान्यतीन्दृष्ट्वा भूरिशो मोहमाप सः ।।३३।।**

नृपचिह्नैः परिष्कृतं श्रीगुरुं सुपालके तु उपवेश्य राड् कुमसीग्रामे, यत्र भारती, निन्ये।२९। सः नृ+सिंह+ध्यान+निष्ठः अपि तदा योगि+मायया चञ्चल+मना सम्भूय ईश्वरं स्तोतुं आजह्वे।३०। (हे) नृसिंह+ईश, दया+अब्धे भक्त+भावन, अद्य ध्याने कस्मात् ते सामीप्यं न? भोः दयस्व, स्तोष्ये।३१। एवं स्तुत्वा स ध्यानात् विभुं नदीतीरे स्थितं ज्ञात्वा त्रस्त+चित्तः अचिन्त्य+अव्यक्त+विग्रहं द्रष्टुं अभ्यगात्।३२। योगि+माया+आवृत+अंतरः त्रिविक्रमः जवेन एत्य भूरिशः उच्च+अवचान् यतीन् दृष्ट्वा सः मोहं आप।३३।

छत्र-चामरादि राजचिह्नांनी सजविलेल्या श्रीगुरूंना उत्तम पालखीत बसवून राजाने त्यांना कुमसी गांवी त्रिविक्रमाकडे नेले.२९. **नृ** म्हणजे जीव, त्याची **सिं** म्हणजे अविद्या **ह** म्हणजे हरण करणारा जो परमात्मा त्या नृसिंहाचे ध्यान त्रिविक्रम यती करीत असत. त्या वेळी मात्र त्यांच्या ध्यानात नेहमी येणारे नरसिंहाचे रूप योगेश्वर श्रीगुरूंच्या मायेने येईना. अशा रीतीने चलच्चित्त झालेल्या यतीने आपल्या इष्टदेवाचे - नृसिंहाचे स्तवन आरंभिले. 'हे दयासागरा, भक्तपालका नृसिंहदेवा, आज ध्यानांत आपण कां बरे येत नाहीत? देवा, दया करा, मी आपले स्तवन करीत आहे!'३१. अशी स्तुती केल्यानंतर त्या त्रिविक्रमाने ध्यानाने प्रभू नदीकांठी असल्याचे जाणून तो ज्याचे स्वरूप अचिंत्य आणि अव्यक्त आहे अशा भगवंताच्या दर्शनासाठी व्याकुळ मनाने नदीकांठी आला.३२. श्रीगुरूंच्या मायेचा चित्तावर पगडा असलेला त्रिविक्रम धावत धावतच तिथे येऊन पाहतो तर त्याला जिकडे तिकडे लहान-मोठे खूपसे संन्यासीच दिसू लागले. त्या विपरीत दर्शनाने त्याचा विवेक हतबल झाला आणि तो पुरता गोंधळून गेला.३३.

**व्यालोकि परितस्तेन सर्वे संन्यासिरूपिणः । ज्यायांसोऽपि कनीयांसः प्रशान्ता दण्डिनोऽमिताः ॥३४॥**
**आहेशो विस्मितं तं यं धिक्करोष्यस्मि दाम्भिकः । भ्रष्टः स इन्मयोद्भाव्य मायामसि परीक्षितः ॥३५॥**
**नृसिंहचिन्तकोऽसि त्वं यतिधर्मसुशिक्षितः । संन्यासी लोकविज्ञातः संन्यस्तं ब्रूहि किं त्वया ॥३६॥**
**न्यस्तसूत्रशिखो दण्डी रागद्वेषाकुलान्तरः । वेषानुकारी संन्यासी धर्मज्ञो वा भवेदपि ॥३७॥**

ईशः तं विस्मितं आह, 'यं धिक्+करोषि सः दाम्भिकः भ्रष्टः अस्मि। इत् मया मायां उद्भाव्य परीक्षितः असि।'३४। तेन परितः सर्वे ज्यायांसः कनीयांसः अपि प्रशांता अमिताः संन्यासिरूपिणः दण्डिनः व्यालोकि।३५। 'त्वं नृसिंह+चिंतकः यति+धर्म+सुशिक्षितः संन्यासी असि। त्वया किं संन्यस्तं?' ब्रूहि।३६। न्यस्त+सूत्र+शिखः दण्डी वेष+अनुकारी धर्मज्ञः वा राग+द्वेष+आकुल+अंतरः संन्यासी भवेत् अपि?३७।

त्याला आजूबाजूला सगळीकडे लहान-थोर अगणित दंड धारण केलेले प्रशांत संन्यासीच दिसूं लागले!३४. आश्चर्याने स्तिमित झालेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'ज्याचा दांभिक आणि भ्रष्ट संन्यासी म्हणून तूं धिक्कार करतोस तोच मी आहे. मीच माया पसरून तुझी परीक्षा घेत आहे.'३५. 'तू नरसिंहाचे ध्यान करतोस, संन्यासधर्माचे उत्तम शिक्षण घेतले आहेस आणि लोकांत तुझे चांगले नांव आहे! मला सांग, तू कशाचा संन्यास (त्याग) केला आहेस?'३६. 'शेंडी कापून आणि जानवे तोडून, हातांत दंड धरून, केवळ संन्याशाचा वेष धारण केला किंवा संन्यासधर्माचा कोरडा अभ्यास केला तरी, जोवर चित्त राग (आसक्ती) आणि द्वेष यांनी व्यापलेले आहे तोवर कुणी संन्यासी होईल कां?'३७.

**दम्भिलक्षणजिज्ञासुरागतोऽस्म्यद्य कृत्स्नशः । त्वं नृसिंहप्रसादेन विद्वंस्तद्वक्तुमर्हसि ।।३८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**प्रत्याहतमतिस्तेऽस्मि भगवन्नीश मायया । नापि वक्तुं हृषीकेश शक्यः पाहि दयानिधे ।।३९।।**

(अहं) दम्भि+लक्षण+जिज्ञासुः आगतः अस्मि। (हे) विद्वन् त्वं नृसिंहप्रसादेन वक्तुं अर्हसि।'३८। त्रिविक्रम उवाच। '(हे) भगवन्, ईश, (अहं) ते मायया प्रति+आहत+मतिः अस्मि। (हे) हृषीकेश वक्तुं अपि न शक्यः। (हे) दयानिधे, पाहि।३९।

'माझ्या वागण्याचा विचार करतांना तूं 'सर्वाठायी आत्मस्वरूपाचा (आपल्याच स्वरूपाचा) साक्षात्कार झाल्यावर कुणी कुणाला पाहायचे?' ह्या बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) याज्ञवल्क्याने मैत्रेयीला केलेल्या उपदेशानुसार 'आत्मसाक्षात्कारी पुरुष सर्व पाहणे, हुंगणे इत्यादि संवेदनारहित दगडासारखा क्रियाशून्य असतो' एवढेच लक्षांत घेतले. छांदोग्यांत (८:१२:३) इंद्राला प्रजापतीने सांगितले आहे की, 'आत्मज्ञानाच्या उंचीवर पोचलेला उत्तम पुरुष स्त्रियांशी वा यानांशी रमतांना दिसला तरी त्याला देहात्मभाव नसतो.' हे तूं विसरलास! आत्मदर्शनाच्या विषयी सांख्यांनी तो देहापासून वेगळा असल्याचे जाणूनही, वेदांचा सिद्धांत न मानल्याने बुद्धी आणि आत्मा यांच्या भेदज्ञानाशीच ते अडून राहिले; कणादादि वैशेषिक विविध रंगांच्या क्षारांत वस्त्राचा शोध घ्यावा तसे नऊ गुणांनी युक्त (गुणातीत) आत्मतत्त्वाचा मागोवा घेत राहिले; तसेच कर्मिष्ठ पूर्वमीमांसक वेदांचे प्रामाण्य मानूनही बाह्य विषयांतच चित्त हरवून बसले आणि त्यांना आत्मैक्यरूप परमार्थसत्य नाशिवंत भासले; हे सगळे रहाटगाडग्यासारखे फिरतच राहिले. संन्यासी असूनही - शांकर अद्वैत सिद्धांताचा स्वीकार करूनही, तुझी त्यांच्यासारखीच अवस्था झालेली दिसते. तूं मला दाम्भिक म्हणतोस ना? तर दाम्भिकाची काय लक्षणे असतात ते तुझ्याकडून समजून घ्यायला मी आलो आहे.'३८. त्रिविक्रम म्हणाला, 'भगवंता, परमेश्वरा, तुझ्या मायेने माझी बुद्धी कुंठित झाली आहे. सर्व इंद्रियांच्या नियंत्या, मला कांही बोलणेही अशक्य झाले आहे. दयासागरा, माझे रक्षण करा!'३९.

**प्रपन्नोऽस्मि क्षमस्वेश मन्तून्मे ध्यानपुण्यतः । साक्षाद्दृष्टं हि ते धाम नृसिंहोऽसि दयस्व भोः ॥४०॥**
**इति स्तुवति तस्मिन्स भगवान्पूर्वरूपतः । प्रादुरासीत्तथाप्यन्ये सैन्या मन्त्री नृपः स्फुटम् ॥४१॥**
**सैन्यमध्ये स्थितं भूप-वीजितं च त्रिविक्रमः । विश्वरूपं स्वनेत्रेण न शशाकापि वीक्षितुम् ॥४२॥**
**तमाह दुर्निरीक्ष्यं मे रूपं दिव्यदृशापि ते । दर्शितं ध्यानहृष्टेन धामाथो पश्य लौकिकम् ॥४३॥**
**ततः प्रशान्तसंन्यासि-रूपेणावस्थितं हरिम् । दृष्ट्वा प्रकृतिगः प्राह भगवन्तं त्रिविक्रमः ॥४४॥**

प्रपन्नः अस्मि। हे ईश, मे मन्तून् क्षमस्व। ध्यान+पुण्यतः हि ते धाम साक्षात् दृष्टम्। भोः नृसिंहः असि। दयस्व!'४०। इति तस्मिन् स्तुवति भगवान् पूर्व+रूपतः प्रादुरासीत्। तथा अन्ये, सैन्या, मन्त्री, नृपः अपि स्फुटम् (प्रादुरासीत्)।४१। सैन्यमध्ये स्थितं भूप+वीजितं विश्वरूपं त्रिविक्रमः स्वनेत्रेण वीक्षितुं न शशाक।४२। तं (श्रीगुरुः) आह। 'दिव्यदृशा अपि दुर्निरीक्ष्यं मे रूपं ध्यान+हृष्टेन (मया) ते दर्शितम्। अथो लौकिकं धाम पश्य।'४३। ततः प्रशांत+संन्यासि+अवस्थितं हरिं दृष्ट्वा प्रकृतिगः त्रिविक्रमः भगवन्तं प्राह।४४।

हे ईश्वरा! मी तुला शरण आलो आहे. माझे अपराध पोटांत घ्या. ध्यानाभ्यासाच्या पुण्याईने मला आज आपले स्वरूप साक्षात् पहायला मिळाले. आपण प्रत्यक्ष नरसिंहच आहांत! माझ्यावर दया करा.'४०. अशा प्रकारे त्रिविक्रमाची प्रार्थना ऐकून भगवान् श्रीगुरू आपल्या पूर्व रूपाने प्रकट झाले. तसेच सेनेसह राजा आणि मंत्रीगणही स्पष्ट दिसूं लागले.४१. सैन्याच्या मध्यभागी राजाने हातांतील चामर वारा घातलेले, श्रीगुरूंनी प्रकटविलेले विश्वरूप त्रिविक्रमाच्या चर्मचक्षूंना पहावले नाही. ते त्याच्या डोळ्यांत सामावेना.४२. विश्वरूपाने दिपलेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'योगादि सायास करूनही दिव्यदृष्टीलाही पहायला कठीण असे हे माझे विश्वरूप तुझ्या ध्यानाभ्यासाने प्रसन्न होऊन तुला दाखविले आहे. आतां हे लौकिक रूप पाहा.'४३. मग त्रिविक्रमाला प्रशांत संन्यासी रूपांत समोर पालखीत बसलेले पापतापहर श्रीगुरू दिसू लागले. आपल्या सहज अवस्थेत येऊन तो प्रभूंना म्हणाला.४४.

**कायेन मनसा वाचा केवलैरिन्द्रियैरपि । असत्कृतोऽसि विश्वात्मन्मया त्वां क्षामयेऽद्य तत् ।।४५।।**
**धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि कृतकार्योऽस्मि दर्शनात् । रूपं पुराऽर्जुनायेदं दर्शितं मेऽद्य तत्पुनः ।।४६।।**
**हरेऽविद्याप्रवाहे मां मज्जन्तं ज्ञाननौकया । कृपामरुत्संगतया स्वात्मरूपतटं नय ।।४७।।**

(हे) विश्व+आत्मन्, कायेन, मनसा, वाचा, केवलैः इन्द्रियैः अपि वा मया असत्+कृतः असि तत् त्वां अद्य क्षामये।४५। 'दर्शनात् धन्यः अस्मि! अनुगृहीतः अस्मि! कृतकार्यः अस्मि! पुरा इदं रूपं अर्जुनाय दर्शितं तत् अद्य पुनः मे (दर्शितम्)।४६। (हे) हरे, अविद्या+प्रवाहे मज्जन्तं मां ज्ञान+नौकया कृपा+मरुत्+संगतया स्व+आत्म+रूपं तटं नय।४७।

'हे विश्वरूप प्रभो, मी ज्या ज्या कांही शारीरिक (हातवारे करून, बोट दाखवून, तोंड वांकडे करून इत्यादि), मानसिक (आपल्याविषयी कुत्सित भाव धरून), वाचिक (धिक्कारादि उच्चारण) कृतींनी अथवा केवळ इंद्रियांनीसुद्धा आपला अधिक्षेप केला त्यांचा मला पश्चाच्चाप होत आहे. मी त्या सर्व अपराधांसाठी आपल्याजवळ क्षमायाचना करीत आहे.'४५. 'आपण दिलेल्या या दर्शनाने मी धन्य झालो आहे! अनुगृहीत झालो आहे! कृतकृत्य झालो आहे! पूर्वी अर्जुनाला दाखविलेले हे विश्वरूप आज आपण मला दखविले आहे!.४६. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा तीन प्रकारच्या दुःखांचे हरण करणाऱ्या हरी, अविद्यारूप जलप्रवाहांत बुडत असलेल्या मला, आपल्या कृपेच्या वाऱ्याने परोक्ष आत्मज्ञानरूपी नौकेला प्रेरवून, जीवात्मा आणि परमात्मा यांच्या अखंडैकरसरूपाच्या (अपरोक्ष ज्ञानरूपी) पैलतीराला पोचवा.' हा रूपक अलंकार आहे.४७.

**तीर्त्वाऽविद्यानदीं ज्ञान-प्लवेन परमं पदम् । द्राग्यास्यत्रैव तिष्ठेति तमुक्त्वा श्रीगुरुर्ययौ ।।४८।।**

श्रीगुरुः तं, 'ज्ञान+प्लवेन अविद्या+नदीं तीर्त्वा द्राक् यासि। अत्रैव तिष्ठ,' इति उक्त्वा ययौ।४८।

त्रिविक्रमाच्या प्रार्थनेवरून हा परमार्थाच्या उपदेशाला योग्य होऊन आपल्याला शरण आला आहे असे पाहून श्रीगुरूंनी त्याला सांगितले की, *'तत्त्वमसि'* इत्यादि महावाक्यांच्या श्रवणाने आणि भागत्यागलक्षणेने निश्चित केलेले अत्मस्वरूपाचे (परोक्ष) ज्ञान हीच नौका ह्या अविद्यारूपी नदीला पार करण्याचे साधन आहे. श्रवण-मनन-निदिध्यासन यांनी अभानावरणरूप अविद्येचा, आणि चिदन्वयदृष्ट्या - सर्व ठिकाणी चैतन्यच पाहत, अवशिष्ट प्रारब्धाचा भोग भोगून विक्षेपरूप अविद्येचा अपक्षय करावा. असे केल्याने देशादि परिच्छेद आणि त्रिविधभेद (सजातीय, विजातीय आणि स्वगत) यांच्या पलीकडचे योग्यांनाच लाभणारे प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अभिन्न स्वरूप ह्याच जन्मी तूं निश्चित पावशील. (तुला पुन्हां जन्म घ्यावा लागणार नाही असा आशय.) तूं इथेच स्थिर हो. इथे म्हणजे नृसिंहाचे ध्यान आणि तत्त्वज्ञानाचे विवेचन यांतच स्थिर हो म्हणजे मनाची गती थांबव. इथेच म्हणजे आत्मरूपांतच स्थिर हो. देहादि अनात्म विषयांचा विचार सोड. 'मी संन्यासी आहे, शौच, आचार, जप करणे मला आवश्यक आहे. जे संन्यासी असे करीत नाहीत ते निंद्य आहेत. जे अनुष्ठान करतात ते वंद्य आहेत' असा दुराग्रह, 'हे सर्व जगत् ईश्वराने व्यापलेले आहे' (ईशोपनिषत् १) ह्या श्रुतीला स्मरून अजिबात सोडून दे. ईशावास्यांतच (ईशोपनिषत् २, ११) 'कर्मांचे अनुष्ठान करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी', इत्यादि उपदेश असला तरी सर्व एषणांचा त्याग केलेल्या तुझ्यासारख्या अधिकारी पुरुषाला त्याचे अनुष्ठान अनुचित आहे. कारण त्याने चित्तविक्षेप होऊं शकतो, जो ज्ञानाला अडसर ठरतो.' (अर्थात परमेश्वराला विमुख असलेल्या साधनरहित सामान्य जीवांना आपापल्या आश्रमांचे अनुष्ठान केलेच पाहिजे.

**क्षणात्ससैन्यभूपेन साकमेत्य मठं प्रभुः । कर्ममार्गं ततानेशश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥४९॥**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे भीमामरजासंगमनिवासो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥**

प्रभुः क्षणात् ससैन्यं भूपेन साकं मठं एत्य लोकसंग्रहं चिकीर्षुः ईशः कर्म+मार्गं ततान।४९।

अन्यथा त्यांना प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो आणि प्रपंच आणि परमार्थ या दोहोंपासून ते भ्रष्ट होतात. हे यांत सुचविलेले आहे.) असा त्याला उपदेश करून श्रीगुरू मठाला परतले.४८. मग प्रभू राजा आणि सर्व सेना यांना घेऊन योगगतीने लगेच मठाला परतले; आणि 'मीच जर आश्रमोचित कर्मांचा त्याग केला तर लोकही तसेच वागूं लागतील (भ.गीता ३:२३-२५) आणि मी अनर्थाला कारण होईन यासाठी मी स्वतः धर्माचे अनुष्ठान करून इतरांकडूनही ते करवून घेईन', अशा लोकसंग्रहाच्या इच्छेने भगवंतांनी कर्ममार्गाचा प्रसार केला.४९.

या अध्यायाबरोबरच द्विसाहस्रीतील ज्ञानकांड पूर्ण होऊन पुढच्या अध्यायापासून पांच अध्यायांत कर्मयोगाची मांडणी केली आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तेरावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।।चतुर्दशोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**ज्ञानयोग इयानुक्तः सिद्ध्यै संन्याससत्पथः। कुतो भगवता पश्चात्कर्मयोगः प्रकाशितः ।।१।।**

नामधारक उवाच। 'सिद्ध्यै संन्यास+सत्+पथः इयान् ज्ञानयोगः उक्तः। भगवता पश्चात् कुतो कर्मयोगः प्रकाशितः ?१।

**श्रीगणेशाय नमः। तेरा अध्यायांत झाले ज्ञानकांडाचे निरूपण। चित्त शुद्ध जयाचे तो यायोगे तोडी कर्मबंधन।।१।। चित्त जयाचे शुद्ध नसे तयाचे पापकर्म नासून। वैराग्य उदयासाठी पांच अध्यायीं कर्मकांडविवेचन।।२।। चौदाव्या अध्यायीं मत्त ब्राह्मणां वेदसार सांगती। श्रीगुरु त्यापरी अंत्यजाकरवी विप्रगर्व परिहरती।।३।।**

नामधारक विचारीत आहे. 'ना कर्म, ना संतति ना संपत्ती या कशानेच अमृतत्वाची प्राप्ती होत नाही, ती एका त्यागानेच होते;' (कैवल्य उ. ३) 'अंधःकाराच्या पलीकडच्या त्या सूर्यसंकाश महान पुरुषाला जाणल्यानेच मृत्यूला ओलांडतां येते; यापेक्षां अन्य मार्ग नाही;' (श्वेताश्वतर उ. ३:८) 'ब्रह्माला जाणणाराच परमपद पावतो;' (तैत्तिरीय उ. २:१:१) ह्या आणि इतरही अनेक श्रुतिवचनांनी कर्मसंन्यासपूर्वक श्रवणादि साधनांनी ज्ञान झाल्यावरच मोक्षाची प्राप्ती होते असे सांगितले आहे. तसेच कर्माने जीव बांधला जातो, असे संन्यासोपनिषदांत व अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणे संन्यास हाच मोक्षाचा उत्तम मार्ग आहे असा ज्ञानयोगाचाही उपदेश केला. मग आतां भगवंत कर्ममार्गाचे प्रतिपादन कां करीत आहेत?'१.

**अविद्याघातकं कर्म तदुत्थं कथमित्यमुम् । छिन्धि मे संशयग्रन्थिम् भगवच्चरितासिना ॥२॥**

'तत्+उत्थितं कर्म कथं अविद्या+घातकम्? अमुं मे संशय+ग्रन्थिं भगवत्+चरित+असिना छिन्धि।'२।

'नवव्या अध्यायांत (द्वि.सा. ९:७०) श्रीगुरूंनीच शिष्यांना उपदेश करतांना स्वाश्रमाला उचित असे कर्म करावे अन्यथा पतन होते. असा उपदेश शिष्यांना केला आहे. मग अशी शंका कां घेतोस?' असा प्रश्न अपेक्षून नामधारक आपला प्रश्न अधिक स्पष्ट करतात. 'अविद्येपासून अविवेक, अविवेकाने देहादि उपाधींचा अभिमान, अभिमानापासून रागद्वेष आणि त्या रागद्वेषांमुळेच कर्म अशा परंपरेने कर्म हे अविद्येपासून निपजलेले आहे. तिच्यापासूनच उद्भवलेले कर्म अविद्येच्याच घाताला कसे कारण होईल? ही माझ्या मनांत पडलेली संशयाची गाठ आपण भगवच्चरित्ररूपी खड्गाने छेदावी.'२.

नामधारकाच्या प्रश्नाचे उत्तर कर्माचा आणि आत्मज्ञानाचा परस्परसंबंध समजून घेऊनच देतां येईल. याविषयी आरंभीच ब्रह्मसूत्राच्या (३:४:२५) आधारे केवळ ज्ञानानेच मोक्ष होतो, त्याला इतर कोणत्याही साधनाची अपेक्षा नाही हे दृढ करतात. सूत्रांत सांगितल्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या हेतूने सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाला अग्नी वा इंधन (समिधा) यांची उठाठेव करण्याची आवश्यकता नाही. आपल्या ज्ञानोपासनेच्याच बळावर तो आपले आत्मप्राप्तीचे ध्येय गाठूं शकतो. हा सिद्धांत दृढ केल्यावर श्रीस्वामिमहाराज त्याच्याच पुढच्या (३:४:२६) सूत्राधारे ज्ञानाच्या मोक्षप्राप्तीच्या कार्याला अन्य कशाचीही (कर्माची) अपेक्षा नसली तरी त्या ज्ञानाच्या उत्पत्तीला मात्र कर्म नितांत आवश्यक आहे. म्हणजेच कर्म हे ज्ञानाचे कारण आहे. ज्ञान आणि कर्म यांचा असा साध्य-साधन संबंध आहे. ज्ञानोत्पत्तीसाठी कर्मे दोन प्रकारे कारणीभूत होतात. १. संस्कारांनी आणि २. विविदिषा उत्पन्न करून.

**संस्कार -** गौतमसूत्रांत खालील चाळीस संस्कारांचा उल्लेख केलेला आहे.

१. गर्भाधान, २. पुंसवन, ३. सीमन्तोन्नयन, ४. जातकर्म, ५. नामकर्म, ६. अन्नप्राशन, ७. चौल, ८. उपनयन.

॥ सिद्ध उवाच ॥

**कर्कटीं तद्भवा घ्नन्ति यथा मृत्क्षालनं मृदा । तथाऽविद्या च कर्मापि कर्मणैव विलीयते ॥३॥**

सिद्ध उवाच। 'यथा कर्कटीं तत्+भवा घ्नन्ति, मृदा मृत्+क्षालनं तथा अविद्या च कर्म अपि कर्मणा एव विलीयते।३।

९. प्राजापत्य, १०. सोम्य, ११. आग्नेय, १२. वैश्वदेव ही चार वेदव्रते.

१३. स्नान (सोडमुंज), १४. सहधर्मिणीसंयोग (विवाह).

१५. देवयज्ञ, १६. भूतयज्ञ, १७. पितृयज्ञ, १८. ब्रह्मयज्ञ आणि १९. मनुष्ययज्ञ हे पांच महायज्ञ.

२०. अष्टका, २१. अन्वष्टका, २२. पार्वणश्राद्ध, २३. श्रावणी, २४. आग्रहायणी, २५. चैत्री आणि २६. आश्वयुजी हे सात पाकयज्ञ.

२७. अग्न्याधान, २८. अग्निहोत्र, २९. दर्शपूर्णमास, ३०. आग्रयण, ३१. चातुर्मास्य, ३२. निरूढपशुबंध, ३३. सोत्रामणि हे सात हविर्यज्ञ.

३४. अग्निष्टोम, ३५. अत्यग्निष्टोम, ३६. उक्थ्यः ३७. षोळशी, ३८. वाजपेय, ३९. अतिरात्र, ४०. आप्तोर्याम हे सात सोमयाग.

'ह्या चाळीस संस्कारांनी युक्त ब्राह्मण सायुज्यता आणि सलोकता या मुक्तींचा अधिकारी होतो असे गौतम स्मृतीचे (८ः१४-२४) वचन आहे. कुठे सोळा, कुठे चोवीस तर कुठे अठ्ठेचाळीस संस्कारांचेही वर्णन आहे. ह्या संस्कारांनी संस्कारित झालेल्या पुरुषाचे चित्तच आत्मज्ञानाला योग्य होते.'

**विविदिषा -** बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे वेदाभ्यास, यज्ञ, दान, तप, उपवास यांनी ब्राह्मणाला विविदिषा उत्पन्न होते. ब्रह्मसूत्रकारांनीही आश्रमकर्म विहितच असल्याने ते केले पाहिजे (३:४:३२) असे म्हणत याचीच पुष्टी केली आहे. स्कंपुराणान्तर्गत सूतसंहितेत (यज्ञवैभव खंड २:६८-६९) असे म्हटले आहे की

महापापी लोकांना ज्ञानयज्ञाविषयी रुची तर नसतेच, उलट ते त्याचा तिरस्कारच करतात. ज्ञानाला प्रतिबंध करणारी पापे, विहित कर्मे परमेश्वरार्पण बुद्धीने केल्याने नाश पावतात. अशा रीतीने चित्तशुद्धी झाल्यानंतर श्रवणादिकांची गोडी लागते. हीच जिज्ञासा किंवा विविदिषा! वार्तिकसाराच्या (३) वचनानुसार कर्मयोगाचा अज्ञानाशी प्रत्यक्ष विरोध नसला तरी आत्मज्ञानाविषयी आवड निर्माण करून तो मोक्षाला साह्यभूत होतो. अविद्येच्या नाशाला ज्ञानच आवश्यक आहे. ज्ञानाच्या उत्पत्तीसाठी शम-दमादि संपत्तीच पाहिजे. अशा रीतीने प्रत्यक्ष नाही तरी परंपरेने कर्मयोगाचे अनुष्ठान मोक्षोपकारक ठरते. (*'रुचिद्वारोपकुर्वन्ति कर्माण्यात्मविमुक्तये। अज्ञानस्याविरोधित्वान्न साक्षादात्मबोधवत्। अविद्याया न चोच्छित्तौ ज्ञानादन्यदपेक्षते। ज्ञानोत्पत्तौ तु नैवान्यच्छमादिभ्यो ह्यपेक्षते। शमाद्युत्पत्तये नान्यद्‌बुद्धिशुद्धेरपेक्षते। बुद्धिशुद्धौ च नित्यादिकर्मभ्यो नान्यदिष्यते। पारम्पर्येण कर्मैवं ज्ञानायैवोपयुज्यते।।*)

कर्म हे अशा रीतीने साधन आहे ज्याचे साध्य ब्रह्मात्मज्ञान आहे असा ज्ञानकांड आणि कर्मकांड यांचा साध्यसाधनसंबंध विशद करण्यासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. गर्भाशयांत असलेली खेकडीची पिले आपल्या पायाच्या तीक्ष्ण टोकांनी आपल्याच मातेचे मृदुतर असे पोट फाडून बाहेर येतात. यावरून ज्याच्यापासून उत्पत्ती झाली त्याला तो मारीत नाही असा काही नियम नाही. जे ज्याच्या विरुद्ध ते त्याला घातकही असते. जशी भांड्याला चिकटलेली माती काढायलाही मातीचाच उपयोग होतो ना? त्याचप्रमाणे अविद्या आणि तिच्यापासून निर्माण झालेले, वरचेवर जन्माला घालणारे कर्म, दोन्हीही, माणसाने ईश्वरोपासना म्हणून, फलाची इच्छा न धरतां केलेल्या योग नावाच्या कर्माने नाश पावतात. अशा प्रकारे निष्काम कर्मयोगाचे आचरण न करणाऱ्यांना मात्र प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो; (कृ.यजुः तैत्तिरीय संहिता १:५:२) मग ज्ञानाची तर वार्ताच नको! भगवद्गीतेतही यासाठीच कर्मयोगाचा पुरस्कार केला आहे. *'तस्माद्योगाय युज्यस्व', 'योगः कर्मसु कौशलम्।। २:५०।।'*, (म्हणून तू योगाचाच अभ्यास कर; तोच कर्मबंधनांतून सुटण्याचा उपाय आहे.) *'कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्त्वा पदं गच्छन्त्यनामयम्।।२:५१।।*.३.

**साधनावधि तत्कार्य-मुपात्तपरसाधनः । ततः संन्यस्य शमवान्भवेन्नैष्कर्म्यसिद्धिभाक् ।।४।।**
**प्रकृत्युत्थगुणैः कोऽपि जात्वकर्मा न तत्फले । सक्तोऽज्ञोऽसक्त इद्विद्वानस्येदं लोकसंग्रहे ।।५।।**

'तत् साधनावधि कार्यम्। उपात्त+पर+साधनः ततः संन्यस्य शमवान् नैष्कर्म्य+सिद्धि+भाक् भवेत्।४। 'कः अपि जातुं प्रकृति+उत्थ+गुणैः अकर्मा न। तत् फले अज्ञः सक्तः, ज्ञः विद्वान् असक्तः। अस्य इदं लोकसंग्रहे।'५।

(ज्ञानी पुरुष समबुद्धीने कर्मांच्या फलाचा त्याग करून जन्मबंधांपासून सुटून निर्विकार अशा परमपदाची प्राप्ती करून घेतात.)

**ज्ञानाची साधने अंगी बाणेपर्यंत कर्म करावे -** 'मागच्या अध्यायांतील टीकेत उद्धृत केलेल्या ईशोपनिषद्वाक्यानुसार (२) कर्म करीतच शंभर वर्षे जगण्याचा श्रुतीचा आदेश आहे. तशाच जिवंत असेपर्यंत अग्निहोत्र करावे अशा आशयाच्या श्रुती आहेत. मग आयुष्य सगळे कर्मानेच व्यापून गेल्यावर संन्यास घेऊन श्रवण करावे' या आदेशाचे अनुसरण करता येणार नाही. मग ज्ञान कसे होणार व मोक्षही कसा मिळणार? ह्या आशंकेच्या समाधानासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. ते - कर्माचे निष्काम अनुष्ठान, शम, दम, तितिक्षा, श्रद्धा समाधान आणि उपरती ही ज्ञानाची प्रत्यक्ष साधने प्राप्त होईपर्यंत करीत राहावे. शमदमादि संपत्तीची जोड झाली की संन्यास घेऊन गीतेत सांगितलेल्या 'नैष्कर्म्यसिद्धी'ची प्राप्ती करून घ्यावी. (*'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति'।।१८:४९।।* इथे शमवान् ह्या शब्दाचा उपयोग, 'परसाधनांच्या प्राप्तीनंतर जसा कर्मत्याग केला तसा पुन्हां ज्ञानप्राप्तीनंतर शमदमादिक साधनांचा त्यागही करायचा का' या शंकेचे निरसन करण्यासाठी केला आहे. गीतेचेही असेच प्रतिपादन आहे. *'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते। योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते'।।६:३।।* शमदमादि ज्ञानसाधने जोवर अंगी बाणत नाहीत तोवर संन्यास हा पतनाचेच कारण होतो. 'कर्मही सोडले आणि ब्रह्मज्ञानही गंवसले नाही' असा हा उभयभ्रष्ट, अंत्यजाप्रमाणे त्याज्य आहे असे गरुडपुराणाचे (प्रेतखंड-धर्मकांडः ४९:६४) मत आहे. शमदमादि दैवी संपत्ती ज्याने कमावली त्याने कधीही - ब्रह्मचर्याश्रमांतून, गृहस्थाश्रमांतून वा वानप्रस्थाश्रमांतून संन्यास घ्यायला हरकत

नाही.

**अहं यथानुतिष्ठामि लोकस्तदनुगो भवेत् । नेदं साध्विति मत्वाऽजः कर्मयोगं जगौ प्रभुः ।।६।।**
**कर्मयोगमयं तस्य चेष्टितं शृणु सादरम् । यच्छ्रुत्वा भवसम्बन्धं छित्वा याति परं पदम् ।।७।।**

'यथा अहं अनुतिष्ठामि लोकः तत्+अनुगः भवेत्। इदं न साधु।' इति मत्वा अजः प्रभुः कर्मयोगं जगौ।६। तस्य कर्म+योग+मयं चेष्टितं सादरं शृणु, यत् श्रुत्वा भव+सम्बन्धं छित्वा परं पदं याति।७।

(*'यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्'*, जाबाल उ. ४). अन्यथा आजन्म निष्काम कर्मयोगाचे आचरण करावे. अशा प्रकारे पूर्वापर श्रुतींचा समन्वय होतो.४. कुणीही कसल्याही अवस्थेत अकर्मा होऊ शकत नाही; कारण तो प्रकृतीच्या गुणांनी विवश असतो. पण ज्ञानी पुरुषही कर्म करतांना दिसतात. त्या दोघांत काय भेद आहे? अज्ञ जन कर्माच्या फलाच्या आसक्तीने प्रेरित होऊन कर्म करतात; तर आत्मज्ञानी पुरुष फळाविषयी अनासक्त असतात. यावर असा आक्षेप येऊ शकतो की प्रयोजनाशिवाय अगदी मूर्ख प्राणीसुद्धा प्रवृत्त होत नाही. मग ज्ञानी पुरुष फलाच्या आसक्तीविना कसा कर्म करतो? या प्रश्नाचे उत्तर असे आहे की आत्मज्ञानी (विद्वान्) लोकसंग्रहासाठी कर्म आचरून दाखवितो.५.

'ज्ञान्यांचा विचार ठीक आहे, पण मग श्रीगुरूंना तसे करायची काय आवश्यकता?' तेच सांगतात, 'मी जसा आचार करीन त्याचेच अनुकरण लोक करतील. संन्यासधर्माला प्रतिकूल वर्तन - राजच्या भक्तीसाठी पालखीत बसणे इत्यादि केले तर इतरही लोक आपापल्या आश्रमाला निषिद्ध असे वागतील. असा संकर होणे हे कांही बरे नाही,' ह्या विचाराने श्रीगुरूंनी कर्मयोगाचा उपदेश केला आहे.६. त्या श्रीगुरूंची कर्मयोगाचा उजागर करणारी लीला श्रद्धापूर्वक ऐक; ही ऐकणारे संसाराचा संबंध छेदून परमपदाला पावतात.७.

**ब्रह्मध्रुग्यवनो राजा कश्चिद्धिंस्रोऽभवत्खलः । सदस्याहूय विप्रान्स स्वाग्रे वेदानपाठयत् ।।८।।**
**वेदान्पठन्ति ये सार्थास्तेभ्यो दास्ये धनं बहु । इत्याकर्ण्य तदुक्तं ये रैलुब्धास्ते तथाऽभजन् ।।९।।**
**श्रुत्वा खलोऽपि वेदार्थं द्विजाग्रे ब्राह्मणान्छ्रुतीः । अकुत्सयद्गवाशेन मिथ्याचारो मतोऽखिलः ।।१०।।**
**एवं सत्येकदा विप्रौ वैदिकावेत्य दुर्विधौ । मत्तौ तमूचतू राजन् वेदशास्त्रविदौ स्व इत् ।।११।।**

कश्चित् ब्रह्म+ध्रुक् खलः यवनः राजा अभवत्। सः विप्रान् सदसि आहूय स्व+अग्रे वेदान् अपाठयत्।८। ये वेदान् सार्थान् पठन्ति तेभ्यः बहु धनं दास्ये। इति आकर्ण्य ये रै+लुब्धाः ते तथा अभजन्।९। खलः अपि वेद+अर्थं श्रुत्वा, द्विज+अग्रे ब्राह्मणान्, श्रुतीः अकुत्सयत्। गवाशेन अखिलः मिथ्या+आचारः मतः।१०। एवं सति एकदां दुर्विधौ मत्तौ, वैदिकौ विप्रौ तम् एत्य ऊचतू, '(हे) राजन्, (आवां) वेद+शास्त्र+विदौ स्वः इत्।'११।

कुणी एक ब्राह्मणद्वेष्टा दुष्ट यवन जातीचा राजा त्या वेळी राज्य करीत होता. तो ब्राह्मणांना आपल्या दरबारात बोलावून आपल्यासमोर त्यांच्याकडून वेदांचे पठण करवीत असे.८. जे त्याच्यापुढे वेदांचे पठण करून अर्थही सांगत त्यांना तो भरपूर दक्षिणा देत असे. ही वार्ता ऐकून धनाचे लोभी असलेले ब्राह्मण त्याच्याकडे येत आणि वेदांचे सार्थ पठण करीत.९. तो दुष्टही वेदांचे अर्थ ऐकून, ब्राह्मणांपुढे सर्व वेदांची आणि यज्ञाचा शेष म्हणून मांस खाणाऱ्या ब्राह्मणांचीही निंदा करीत असे. सर्व मानवांचे देह मुखादि अवयवांनी सारखेच असतांना वर्णाश्रमाचे प्रतिपादन करणारा, दगडां-लाकडांसारख्या जड वस्तूंत, मूर्तीत आणि चित्रांत तसेच पिंपळादि झाडांतही दैवतांची कल्पना करणाऱ्या वैदिक धर्माच्या समग्र आचाराला तो गोभक्षक मिथ्या ठरवीत असे.१०. असा त्या राजाचा क्रम चालू असतां दोन आचारहीन आणि विद्येच्या मदाने उन्मत्त झालेले ब्राह्मण त्याच्याकडे आले आणि त्याला म्हणाले, 'राजेसाहेब! आम्ही चारही वेद आणि सहा शास्त्रांचे अध्ययन केलेले आहोत.११.

**अस्मत्तुल्यौ न कौ क्वापि त्वन्निघ्नाश्चेदिहानय । श्रुत्वेदं स्वाश्रितेभ्यो राट् शशंसोचुः खलं हि ते ।।१२।।**
**न यान्ति संमुखे केऽपि तयोस्तत्तौ समर्चय । राजाप्यानर्च तौ विप्रौ गजावारोह्य भूषितौ ।।१३।।**
**जैह्व्यौपस्थ्यसुखासक्ति-निदानेनेदृशी स्थितिः । वेदज्ञानामधःपात-शङ्कावर्जितचेतसाम् ।।१४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**विद्यापरिश्रमो वादं विना न सफलोऽस्ति नौ । तदाज्ञापय गच्छावो गां जेतुं विदुषो द्विजान् ।।१५।।**

कौ क्व अपि अस्मत्+तुल्यौ न । त्वत्+निघ्नाः चेत् इह आनय। इदं श्रुत्वा राट् स्व+आश्रितेभ्यः शशंस। ते हि खलं ऊचुः।१२। के अपि तयोः संमुखे न यान्ति। तत् तौ समर्चय। राजा अपि तौ विप्रौ गजौ आरुह्य भूषितौ आनर्च।१३। जैह्व्य+औपस्थ्य+सुख+आसक्ति+निदानेन अधःपात+शंका+वर्जित+चेतसां ईदृशी स्थितिः।१४। विप्रौ उचतुः। 'नौ विद्या+परिश्रमः वादं विना न सफलः। तत् विदुषः द्विजान् जेतुं गां गच्छावः। आज्ञापय।'१५।

'संपूर्ण भूमंडलावर आमच्यासारखे विद्वान् ब्राह्मण कुठेच नाहीत. तुझ्या पदरी असतील तर त्याना आमच्यासमोर वादासाठी आण!' ही त्यांची प्रौढी ऐकून राजाने आपल्या दरबारांतील ब्राह्मणांना विचारले. ते त्या दुष्टाला म्हणाले.१२. 'त्यांच्यासमोर कुणीही वादाला उभेही राहणार नाहीत. तेव्हां त्यांचाच आपण सत्कार करावा.' राजाने त्याप्रमाणे त्या ब्राह्मणद्वयांचा हत्तीवर बसवून, वस्त्रे भूषणे देऊन आदरसत्कार केला.१३.

रसना आणि लिंग यांच्या सुखांच्या आसक्तीने धनाच्याच मागे लागून वेदविक्रयादि दुष्कर्मे करतांना, वेदांचे अध्ययन करूनही, अधःपाताची शंकाही ज्याच्या मनाला शिवत नाही; 'काय तो हाच लोक आहे, परलोक म्हणून कांही नाहीच' असे मानणाऱ्या नास्तिकांची अशी स्थिती होते. यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाप्रमाणे (कठ उ. १:२:६) ते पुनः पुन्हां मृत्यूलाच वश होत राहतात. १४. ते ब्राह्मण राजाला म्हणाले, 'आम्ही कष्टाने संपादन केलेल्या वेदविद्येचे साफल्य वादाविना होणार नाही. तरी सर्व पृथ्वीवर पर्यटण करून विद्वान ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हाला आज्ञा द्या.'१५.

**स तथाप्यादिशद्विप्र-पराभवपरो नृपः । जयपत्रं द्विजान्जित्वा गृह्णन्तौ चेरतुर्भुवम् ॥१६॥**
**वावदूकतया मिथ्या द्विजांस्तर्जयतोः सदा । विवादं त्याजितैः प्राज्ञैर्जयोऽभूद्विशदस्तयोः ॥१७॥**
**त्रिविक्रमं त्रयीज्ञं तौ श्रुत्वागत्योचतुः कुरु । चेद्वेदज्ञोऽसि वादं नौ देहि वा जयपत्रमित् ॥१८॥**

**॥ त्रिविक्रम उवाच ॥**

**वेदज्ञास्त्वादृशाः पूज्या द्विजौ नाहं तथाविधः । यतौ जयाजयसमे जिते किं वां भवेदिह ॥१९॥**

सः विप्र+पराभव+परः नृपः तथा आदिशत्। द्विजान् जित्वा जयपत्रं गृहणन्तौ भुवं चेरतुः।१६। प्राज्ञैः सदा विवादं त्याजितैः मिथ्या वावदूकतया द्विजान् तर्जयतोः, तयोः विशदः जयः अभूत्।१७। त्रिविक्रमं त्रयीज्ञं श्रुत्वा तौ (तं) आगत्य ऊचुः। 'चेत् वेदज्ञः असि वादं कुरु जयपत्रं इत् वा नौ देही।'१८। त्रिविक्रम उवाच। '(हे) द्विजौ, त्वादृशाः वेदज्ञाः पूज्याः। अहं न तथाविधः। जय+अजय+समे यतौ जिते वां इह किं भवेत्?'१९।

विप्रांचा पराभव करून वैदिक धर्माचा अधिक्षेप करण्यासाठी उत्सुक असलेल्या त्या राजाने त्या ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणे आज्ञापत्र दिले. तेही ब्राह्मणांशी वादविवाद करून त्यांना जिंकून जयपत्र घेत भूमीवर संचार करू लागले.१६. खरे विद्वान् कधीही वादविवाद करीत नसल्याने, वितंडवादाने आणि लटक्या युक्तिवादाने इतर ब्राह्मणांचा अधिक्षेप करण्याने त्या दोघांचा जिकडेतिकडे विजय होऊ लागला.१७. त्रिविक्रम यति हे तीनही वेदांचे जाणते आहेत अशी त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्याकडे जाऊन त्यांनी त्यांना वादाचे आह्वान दिले. म्हणाले, 'आमच्याशी वाद कर अथवा आम्हांला जयपत्र तरी दे!'१८. त्रिविक्रम म्हणाले, 'ब्राह्मण हो! आपल्यासारखे वेदांचे ज्ञानी सन्माननीय आहेत. मी त्यापैकी नाही.' इथे त्या ब्राह्मणांना **वेदज्ञ** असे संबोधन उपहासगर्भ आहे. मनुस्मृतीच्या वचनानुसार (६:८२) अध्यात्माच्या ज्ञानावांचून वेदांचे तत्त्व जाणतां येत नाही किंवा वैदिक कर्मांचे इष्ट फलही प्राप्त होत नाही. अध्यात्माचा गंधही नसणारे हे ब्राह्मण वेदज्ञ होऊंच शकत नाहीत. पुढे त्रिविक्रम भारती त्या ब्राह्मणांना म्हणाले, 'आम्हां संन्याशांना जय आणि पराजय दोन्ही सारखेच. तेव्हां अशा संन्याशाकडून जयपत्र घेण्यांत तुम्हांला काय हशील?'१९.

**पश्येमान्यमितानि त्वं पत्रं देहीति भाषितः । ताभ्यां दास्ये गुरोरग्र इत्युक्त्वा श्रीगुरुं ययौ ।।२०।।**
**तौ मत्तौ स्वासनारूढौ मूढौ तमनुजग्मतुः । मठे श्रीगुरुमासाद्य तमस्तौषीत् त्रिविक्रमः ।।२१।।**
**नम ॐकाररूपाय निर्गुणाय गुणात्मने । जगद्गुरो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत ।।२२।।**
**नाज्ञानान्धः परं वेत्ति यं घूक इव भास्करम् । स त्वं भो मत्तविप्रद्विड्-द्विजौ शासितुमर्हसि ।।२३।।**

'पश्य, इमानि अमितानि (जयपत्रानि), त्वं पत्रं देहि', इति भाषितः (त्रिविक्रमः), 'ताभ्यां गुरोः अग्रे दास्यामि', इति उक्त्वा श्रीगुरुं ययौ।२०। तौ मत्तौ स्व+आसन+आरूढौ मूढौ तं अनुजग्मतुः। त्रिविक्रमः मठे श्रीगुरुं आसाद्य तं अस्तौषीत्।२१। 'नम ॐकार+रूपाय निर्गुणाय गुणात्मने, पर+आनन्द+मूर्ते नमः। हे जगद्गुरो, अच्युत, जय, जय।२२। यं परं अज्ञान+अंधः, घूक इव भास्करं न वेत्ति, सः त्वं भो मत्त+विप्र+द्विट्+द्विजौ शासितुं अर्हसि।'२३।

'ही पहा असंख्य जयपत्रे आम्ही मिळवली आहेत; तूं पण तसेच पत्र लिहून दे!', असा त्यांचा आग्रह पाहून, 'बरे तर, गुरूंच्या समोर देतो', असे बोलून त्रिविक्रम त्यांना घेऊन गाणगापूरला श्रीगुरूंच्याकडे गेला.२०. ते मदांध ब्राह्मण आपापल्या पालख्यांत बसून त्रिविक्रमाच्या मागे गेले. ह्या अशिष्ट वर्तनांतून त्यांनी आपले मूर्खत्वच प्रकट केले. त्रिविक्रमाने गाणगापूरच्या मठांत येऊन श्रीगुरूंना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. २१. 'भगवंता, मायेच्या तीन गुणांनी नटलेल्या या प्रपंचाचा आपल्याशी कांही एक संबंध नाही; आपण आपल्या स्वाभाविक आनंदांतच निमग्न आहांत; द्वैत वा अद्वैत या दोन्हींच्या पलीकडे आपण आहांत; काल, देश आणि वस्तू यांनी परिच्छिन्न नाहीत; स्वगत, सजातीय आणि विजातीय हे भेदही आपल्यांत नाहीत; निन्दा आणि स्तुती आपल्याला सारखीच आहेत; शत्रू आणि मित्र यांना एकरूपच आहांत; आपल्या सर्व इंद्रियांतून प्रसन्नता ओसंडते आहे; मुखावर स्मितहास्य विलसत आहे; निश्चिंत आणि कृतार्थ असे आपण सच्चिदानंदब्रह्मांत स्थिरावलेले आहांत; म्हणजेच आपण ॐकारस्वरूप आहांत. आपल्याला नमस्कार असो!'२२.

**स्तुत्वैवमादितः सर्वं शशंसागमकारणम् । तौ प्राह गुरुरप्याप्तौ साध्यमेतेन किं द्विजौ ।।२४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**राज्ञाज्ञप्तौ द्विजान्जेतुमावां विद्वत्तमौ भुवि । अत्रानीतावनेनोभौ भिक्षू किं वेदपारगौ ।।२५।।**

एवं स्तुत्वा सर्वं आगम+कारणं आदितः शशंस। गुरुः अपि तौ आप्तौ प्राह, 'द्विजौ, एतेन किं साध्यम्?'२४। विप्रौ ऊचतुः, 'राज्ञा आवां भुवि विद्वत्+तमौ द्विजान् जेतुं आज्ञप्तौ। अनेन (त्रिविक्रमेण) उभौ अत्र आनीतौ। (युवां) भिक्षू वेद+पारगौ किम्?' २५।

'तर तूं सगुणाला वंदन करतोस कां?' हा प्रश्न अपेक्षून निर्गुणाला नमस्कार केला आहे. 'मग असा निर्गुण मी शब्दाना कसा गंवसेन?' या प्रश्नाच्या उत्तरी, 'भक्तांवर कृपा करण्यासाठी सगुणरूप धारण केलेल्या आपणांस नमस्कार असो. या अवतारविग्रहांतही आपले सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व आणि सर्वशक्तित्व अस्खलित आहे म्हणून हे अच्युता, सर्व जगाच्या गुरो, निरुपाधिक, निरतिशय आनंद हीच आपली मूर्ती आहे; आमच्या मूर्तीसारखी प्रारब्धकर्मापासून झालेली नाही. भक्तांची मायेच्या आवरणशक्तीपासून सुटका करून विजयी हो, विजयी हो!' एवढे श्रीगुरूंचे सामर्थ्य आहे हे **अच्युत** या संबोधनांतून सूचित केले आहे. 'एवढा मी महान् असूनही लोक मला कसे ओळखत नाहीत?' हा प्रश्न अपेक्षून त्रिविक्रम सांगतात, अज्ञानाने आंधळे झालेले लोक, दिवांधाने सूर्याला पाहूं नये तसे परम ज्योतिस्वरूप ज्ञानप्रदीप आपणांस जाणत नाहीत.'. यावर श्रीगुरूंनी 'तें असूं दे आत्तां तुझ्या येण्याचे काय प्रयोजन आहे?' असे विचारल्यावर त्रिविक्रम म्हणतात, 'हे विद्येच्या मदाने मस्त होऊन गावोगांव ब्राह्मणांचा अधिक्षेप करणारे - त्यांचा द्वेष करणारे, दोघे ब्राह्मण आले आहेत. त्यांना आपणच शासन करूं शकतां.'२३. अशा प्रकारे स्तुती करून त्रिविक्रमाने आपल्या येण्याचे कारण सविस्तर निवेदन केले. तेव्हां श्रीगुरू त्या तिथे आलेल्या दोघा ब्राह्मणांना म्हणाले, 'ह्या व्यर्थ ब्रह्मद्वेषाने तुम्ही काय साधणार आहांत?'२४. ते ब्राह्मण म्हणाले, 'आम्ही सर्वश्रेष्ठ विद्वान् असून पृथ्वीवरील सर्व ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हांला राजाने आज्ञा केली आहे. ह्या त्रिविक्रमाला आम्ही जयपत्र मागितले असतां तो आम्हांला इथे घेऊन आला आहे. तुम्ही दोघे संन्यासी काय वेद जाणाल?'२५.

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**गर्वेणैव प्रणष्टाः स्यू राक्षसा असुरा द्विजौ । अनादीन्कृत्स्नशोऽनन्तान्कोऽपि वेदान्न वेद रे ॥२६॥**
**ब्रह्मचर्याश्रमे वेदान्पठितुं प्राक्तपोऽतपत् । भरद्वाजो विधिः प्रीतस्तस्मै वेदानदर्शयत् ॥२७॥**
**दृष्ट्वा भास्वद्वेदराशीन् शङ्कितोऽभूदृषिर्ददौ । त्रीन्मुष्टीनृषयेऽद्यापि पठ्यमानो न पारगः ॥२८॥**

श्रीगुरुः उवाच। (हे) द्विजौ, असुरा, राक्षसा गर्वेण एव प्रणष्टा स्यू। अनादीन् अनन्तान् वेदान् कृत्स्नशः कः अपि न वेद, रे!२६। प्राक् भरद्वाजः ब्रह्मचर्य+आश्रमे वेदान् पठितुं तपः अतपत्। प्रीतः विधिः तस्मै वेदान् अदर्शयत्।२७। भास्वत् वेदराशीन् दृष्ट्वा ऋषिः शंकितः अभूत्। (ब्रह्मा) ऋषये त्रीन् मुष्टीन् ददौ। (सः) अद्य अपि पठ्यमानः, न पारगः।२८।

श्रीगुरूंनी त्या ब्राह्मणांची गर्वोक्ति ऐकून त्यांना समजाविले की, 'अरे ब्राह्मणांनो, बली, बाण इत्यादि असुर तसेच रावणादि राक्षस हे गर्वानेच नष्ट झाले! अपौरुषेय - म्हणजे कुणाही व्यक्तीने न रचलेले म्हणून अनादि असलेले आणि अनंत असलेले वेद पूर्णतः कुणीच जाणले नाहीत.' इथे कुणी बृहस्पतींच्या वचनानुसार वेदांचे कर्ते सगळे मुनि, भाण्ड, निशाचर होते (सर्वदर्शनसंग्रह - चार्वाकदर्शनपरिचय) असे म्हणतील तर ते मत शास्त्रविरुद्ध आहे. बृहदारण्यक उपनिषदानुसार (२:४:१०) ऋक्, साम, यजुः व अथर्व वेद हे परब्रह्माची निःश्वसिते (उछ्वास) आहेत. कृ. यजुर्वेदांत (३:८:११:४) वेद अनंत असल्याचे प्रतिपादन आहे.२६. पूर्वी भरद्वाज ऋषींनी वेद शिकण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमांत तप केले. ब्रह्मदेवांनी प्रसन्न होऊन त्यांना सर्व वेदांचे दर्शन घडविले.२७. वेदांच्या त्या तेजस्वी पर्वतप्राय राशींकडे पाहून भरद्वाजाच्या मनांत 'आपल्याकडून इतके सर्व वेदांचे अध्ययन कसे पार पडेल?' अशी शंका आली. तेव्हां ब्रह्मदेवांनी त्याला त्या वेदांच्या राशींतील आपल्या हाताने केवळ तीन मुठी काढून पुस्तकरूपाने दिल्या. आजवर भरद्वाज मुनि त्यांचे पठण करीत आहेत; पण त्यांचाही अभ्यास पूर्ण झालेला नाही.२८.

**पैलो वैशम्पायनश्च जैमिनिश्च सुमन्तुकः । ऋग्यजुःसामाथर्वाख्या अशिक्षन्त श्रुतीः क्रमात् ।।२९।।**
**गुरुर्व्यासो हरिः साक्षात्ततोऽत्र प्रसृता श्रुतिः । पठिताः कतिचिद्वेदा आयुष्मद्भिर्युगान्तरे ।।३०।।**
**शाखयैवाल्पायुषोऽत्र मन्दा वेदज्ञमानिनः । प्रतिग्रहपरान्नस्त्री-सक्ताः सिद्धिविवर्जिताः ।।३१।।**
**व्यासेनोक्ताश्चतुर्वेदाः शाखाङ्गोपाङ्गसंयुताः । आयुर्वेदस्ततो रुग्हृदृग्वेदस्योपवेद उत् ।।३२।।**
**स्वर्णोऽत्रिगोत्रजो गायत्रच्छन्दो ब्राह्मदैवतः । द्व्यरत्निमात्रो दीर्घाक्ष ऋग्वेदो व्यक्तकन्धरः ।।३३।।**

पैलः, वैशयम्पायनः च जैमिनिः च सुमन्तुकः क्रमात् ऋक्+यजुः+साम+अथर्व+आख्या श्रुतीः अशिक्षन्तः।२९। गुरुः व्यासः साक्षात् हरिः। ततः अत्र श्रुतिः प्रसृता। युगान्तरे आयुः+मत्+भिः कतिचित् वेदाः पठिताः।३०। 'अत्र मन्दा अल्पायुषः शाखया एव वेदज्ञमानिनः प्रतिग्रह+पर+अन्न+स्त्री+सक्ताः सिद्धि+विवर्जिताः।'३१। व्यासेन शाखा+अङ्ग+उपाङ्ग+संयुताः चतुः वेदाः उक्ताः। रुक्+हृत् आयुर्वेदः ऋग्वेदस्य उत् उपवेद ततः ।३२। ऋग्वेदः सु+अर्णः अत्रि+गोत्रजः, गायत्र+छन्दः, ब्राह्म+दैवतः, द्वि+अरत्नि+मात्रः, दीर्घाक्षः, व्यक्त+कंधरः।३३।

पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमन्तु ह्या चार शिष्यांनी अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद ह्या चार श्रुतींचे शिक्षण घेतले.२९. त्यांचे गुरू व्यासमुनि हे साक्षात् विष्णूचा अवतार होते. ह्या काळांत (कलियुगांत) त्यांच्यापासूनच वेदांचा प्रसार झाला. कृतादि पूर्वींच्या युगी दीर्घयुषी मुनींनी कांही कांही वेदांचे अध्ययन केले.३०. 'ह्या कलियुगांत मात्र अल्पायुषी, अल्पबुद्धी ब्राह्मण एखाद्या शाखेच्या अध्ययनानेच स्वतःला वेदज्ञ मानतात. तसेच प्रतिग्रह (दान घेणे) परान्न आणि परस्त्री यांच्या ठिकाणी आसक्त असतात. त्यामुळे ते वेदमंत्रांच्या सिद्धीपासून वंचितच राहतात.'३१. आश्वलायनादि शाखा, शिक्षा, कल्प, छंद, व्याकरण, निरुक्त आणि ज्योतिष ही अंगे तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा आणि वेदांत ही उपांगे यांच्यासहित व्यासांनी चार वेदांचे निरूपण केले आहे.

**ऋग्वेद -** त्यांत पहिला ऋग्वेद. रोगनाशक आयुर्वेद हा त्याचा उत्कृष्ट उपवेद विस्तारलेला आहे.३२. हा ऋग्वेद सुंदर अक्षरांचा, किंवा सुवर्णाच्या रंगाचा; अत्रिगोत्रोत्पन्न; गायत्र्यादि छंदांनी सुबद्ध आहे. ह्याचे **दैवत** ब्रह्मा आहे. ह्याच्या ध्यानाची दोन हात उंच, विशाल नेत्रांची आणि रुंद खांद्याची आहे.३३.

**शाकला बाष्कला तस्याः सांख्यायन्याश्वलायनि । माण्डूक्येत्थं पञ्च शाखा अष्टौ विकृतयस्त्वृचः ।।३४।।**
**निरुक्तं व्याकृतिर्ज्योतिश्छन्दः शिक्षा च कल्पकः । अस्येमानि षडङ्गानि वेत्तीमं कोऽद्य कृत्स्नशः ।।३५।।**
**पञ्चारत्निमितोऽर्काभः कपाली कृशदीर्घकः । यजुर्वेदो धनुर्वेदः क्षत्रेष्टोऽस्योपवेद उत् ।।३६।।**
**त्रिष्टुप्छन्दो भरद्वाज-गोत्रजो विष्णुदैवतः । षडशीतिभिदोऽङ्गानि प्राग्वदाष्टादशास्य तु ।।३७।।**
**परिशिष्टान्युपाङ्गानि षडेवैष इयान् ततः । क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी तृतीयकः ।।३८।।**

तस्यः शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि मांडूक्य इत्थं पञ्च शाखा। ऋचः अष्टौ विकृतयः।३४। अस्य निरुक्तं, व्याकृतिः, ज्योतिः, छंदः, शिक्षा च कल्पकः इमानि षड्+अङ्गानि। अद्य इमं कृत्स्नशः कः वेत्ति?३५। यजुर्वेदः पञ्च+अरत्नि+मितः अर्काभः कृश+दीर्घकः। उत क्षत्र+इष्टः धनुर्वेदः अस्य उपवेदः।३६। त्रिष्टुप्+छंदः भरद्वाज+गोत्रजः विष्णुदैवतः षड्+अशीति+भिदः, अस्य अङ्गानि पूर्ववत्, तु अष्टादश (परिशिष्टानि),।३७। उपाङ्गानि षट् एव। इयान् (यजुर्वेदः) ततः। तृतीयकः क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी।३८।

ऋग्वेदाच्या शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि आणि मांडूक्य अशा पांच **शाखा** आहेत; आणि जटा, माला, शिखा, लेखा, ध्वज, दण्ड, रथ, घन अशा आठ **विकृती** आहेत.३४. निरुक्ती, व्याकरण, ज्योतिष्, छंद, कल्प आणि शिक्षा ही या ऋग्वेदाची सहा **अंगे** आहेत. आजच्या काळांत ह्याला पूर्णपणे कोण जाणतो? अर्थात् कुणीही नाही.३५.

**यजुर्वेद -** आतां यजुर्वेदाविषयी सांगतात. हा पांच हात उंचीचा, सूर्यसंकाश, कृश आणि उंच आहे. तसेच क्षत्रियांना प्रिय असलेला धनुर्वेद याचा **उपवेद** आहे.३६. ह्याचा त्रिष्टुप् **छंद** आहे, **गोत्र** भरद्वाज आहे आणि **दैवत** विष्णु आहे. ह्याचे शाऐंशी **भेद** असून ह्याला अठरा **परिशिष्टे** आहेत.३७. याचीही उ**पांगे** सहाच आहेत. असा ह्या यजुर्वेदाचा विस्तार आहे.३८.

**षडरत्निमितोऽस्योप-वेदो गान्धर्वसंज्ञकः । रुद्राधिदेवो जगतीच्छन्दः काश्यपगोत्रजः ।।३९।।**
**हता नष्टाश्चापि शिष्टा नवाष्टौ च भिदोऽस्य तु । सामाङ्गोपाङ्गभेदेन कः पुमान्वेदितुं क्षमः ।।४०।।**
**चण्डस्तीक्ष्णोऽसितः काम-रूपी क्षुद्रक्रियोऽशुभः । स्वदारातुष्टोऽथर्वाख्यः शस्त्रास्त्रोपाङ्गवेद उत् ।।४१।।**

षड+अरत्नि+मितः। अस्य उपवेदः गान्धर्वसंज्ञकः। अधिदेवः रुद्रः। जगती छन्दः काश्यपगोत्रजः।३९। अस्य तु भिदः हता नष्टाः च अपि तु नव+अष्टौ शिष्टाः। साम अङ्ग+उपाङ्ग+भेदेन वेदितुं पुमान् क्षमः किम्?४०। अथर्वाख्यः चण्डः, तीक्ष्णः, असितः, कामरूपी, क्षुद्रक्रियः अशुभः स्व+दारा+तुष्टः शस्त्रास्त्र+उपाङ्ग+वेदः।४१।

**सामवेद -** तिसरा सामवेद क्षमाशील, निग्रही, शुचि, नित्य हार घालणारा, ढाल व काठी घेतलेला, सहा हात उंच आहे. याचा **उपवेद** गांधर्ववेद (संगीत) आहे. सामवेदाची **देवता** रुद्र, **छंद** जगती आणि **गोत्र** काश्यप आहे.३९. ह्याचा सहस्रावधी शाखांतून कित्येक इंद्राने चोरल्या तर कांही कालौघांत नाश पावल्या. तरीही आसुरायणी, वार्तान्तवेया, वासुरायणी, प्राञ्जली, ऋग्वेनविधा, प्राचीनयोग्या, ज्ञानयोग्या आणि राणायनी आठ शाखा शेष आहेत. त्यांतील राणायनीच्या आणखी नऊ शाखा आहेत. त्या अशा - राणायनीया, शाट्यायनीया, शाट्या, मुद्गला, खल्वला, महाखल्वला, लाङ्गला, कौथुमा, गौतमा आणि जैमिनीया.४०.

**अथर्ववेद -** चौथा अथर्व नांवाचा वेद चण्ड व तीक्ष्ण (अभिचारादि प्रयोगांचा प्रवर्तक), इच्छेला येईल ते रूप धारण करणारा, वशीकरणादि ऐहिक फल देणाऱ्या क्षुद्र क्रियांचा प्रवर्तक आणि स्वपत्नीत संतुष्ट आहे. अभिचार आणि वशीकरणादि प्रयोगांमुळे हा पतनाला कारण होतो म्हणून याला अशुभ म्हटले असले तरी ईश्वरप्रीतीसाठी ह्याचे सेवन केले तर तो शुभद मोक्षदायी होतो. किंवा याची उपनिषदे प्रश्न, मुंडक आणि मांडूक्य ही मोक्षप्रद आहेत आणि मोक्षानंतर शुभ राहत नाही असा अशुभ. याला तैत्तिराय उपनिषदांत पुच्छाबरोबरच प्रतिष्ठा असेही म्हटले आहे.४१.

**बैजानगोत्रजोऽनुष्टुप्छन्दा एषैन्द्रदैवतः । नवास्य भेदाः संपूर्णाः कल्पाः पञ्चात्र वेत्ति कः ।।४२।।**
**वर्षेऽद्य भारते कर्म-भ्रष्टा हीना द्विजातयः । वेदान्क्रीणन्त्यन्त्यजाग्रे सत्त्वहीना अतोऽभवन् ।।४३।।**
**उत्सृष्टोपाकृताभ्यस्त-गुप्तवेदमनुर्भुविः । किं न दास्यति विप्रेभ्यः प्रत्येकः कामधेनुवत् ।।४४।।**
**देवाधीनं जगन्मन्त्र-निघ्ना देवास्तु मन्त्रकाः । ब्रह्माधीना ब्राह्मणा मे देवता विष्णुरब्रवीत् ।।४५।।**

एष बैजानगोत्रजः, अनुष्टुप्+छन्दा, ऐन्द्र+दैवतः। अस्य भेदा नवा, कल्पाः पञ्च, कः संपूर्णाः वेत्ति?४२। अद्य भारते वर्षे कर्मभ्रष्टा हीना द्विजातयः अन्त्यज+अग्रे वेदान् क्रीणन्ति अतः सत्त्व+हीना अभवन्।४३। देवाधीनं जगत्, देवाः तु मंत्र+निघ्नाः, मन्त्रकाः ब्रह्म+अधीना, ब्राह्मणा मे देवता विष्णुः अब्रवीत्।४४। उत्सृष्ट+उपाकृत+अभ्यस्त+गुप्त+ वेद+मनुः प्रत्येकः विप्रेभ्यः भुवि कामधेनुवत् किं न दास्यति?४५।

हा अथर्ववेद **बैजानगोत्री** आहे; याचा **छंद** अनुष्टुप् आहे; आणि **देवता** इन्द्र आहे. याच्या पैप्पला, प्रथमा, दांता, प्रदांता, आख्याता, स्तौता, ख्याता, ब्रह्मदावला आणि शौनकेया अशा नऊ **शाखा** असून याला विधान, नक्षत्र, संहिता, शांती आणि विधिविधान असे पांच **कल्प** आहेत. या सर्वांचे संपूर्ण ज्ञान कुणाला बरे होऊं शकेल?४२.

आज ह्या भरतवर्षांत ब्राह्मणांनी आचार सोडल्यामुळे ते हीन झाले आहेत; अंत्यजांपुढे वेदाचा विक्रय करतात आणि त्यामुळे त्यांचे मंत्रसामर्थ्य लुप्त झाले आहे. ते केवळ मंत्राचे अक्षरधारी झाले आहेत.४३. शिक्षा या वेदांगाला अनुसरून (*'सुतीर्थादागतं व्यक्तं स्वाम्नाय्यं सुव्यवस्थितम्। सुस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते।।'* पाणिनीय शिक्षा ५१) मौखिक परंपरेने शिकलेला, उत्सर्जन आणि उपाक्रमाने टिकविलेला आणि भोजनादि नियमपालनाने आणि स्त्रीशूद्रादिकांच्या संपर्कापासून राखलेला एकेक वेदमंत्रसुद्धा ब्राह्मणाला काय देऊं शकणार नाही? सर्व कांही देईल. या भूमीवर तो कामधेनूसमानच आहे. एका मंत्राचे हे सामर्थ्य आहे. मग संपूर्ण वेदाचे सामर्थ्य केवढे असेल?४४. जग देवतांच्या अधिष्ठानावर टिकून आहे. ऋग्वेदाच्या प्रतिपादनानुसार (१:४०:५) देवता मंत्रामध्ये अवस्थित आहेत. त्या मंत्रांच्या उच्चाराचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे. ते ब्राह्मण माझे दैवत आहेत असे साक्षात् विष्णू म्हणाले आहेत.४५.

**सर्वस्वदक्षिणा भूपैर्दत्तापि ब्राह्मणैः पुरा । नात्ता कृतोऽद्रिस्तृणवत् सुसत्त्वाच्चाद्रिवत्तृणम् ।।४६।।**
**वशसर्वामरास्तेऽपि तदा स्वल्पज्ञमानिनः । युवां भ्रष्टौ भ्रष्टमन्त्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ ।।४७।।**
**आत्मस्तुतिपरौ ब्रह्म-द्विषौ साध्वात्मवञ्चकौ । त्वत्तुल्या ये पुरा जाता जातास्ते ब्रह्मराक्षसाः ।।४८।।**

'पुरा भूपैः सर्वस्व+दक्षिणा दत्ता अपि ब्राह्मणैः न अत्ता। सुसत्त्वात् अद्रिवत् तृणं, अद्रिः तृणवत्, च कृतः।४६। तदा वश+सर्व+अमरा अपि ते स्वल्पज्ञ+मानिनः। युवां भ्रष्टौ, भ्रष्ट+मंत्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ।४७। आत्म+स्तुति+परौ, ब्रह्म+द्विषौ साधु+आत्म+वंचकौ। पुरा ये त्वत्+तुल्या जाता ते ब्रह्मराक्षसाः जाताः।'४८।

'पूर्वीच्या काळी राजे-महाराजांनी सर्वस्वाचीही दक्षिणा देऊ केली असता ती ब्राह्मणांनी स्वीकारली नाही. कारण प्रतिग्रह हा तपाच्या तेजाचा नाशक असतो. त्यामुळे त्यांच्या मंत्रांत उत्कृष्ट सामर्थ्य होते. त्यामुळे ते गवताच्या काडीचाही पर्वत करीत तर पर्वताला कस्पटासमान करीत.'४६. तैत्तिरीय आरण्यकांत (२:१५) सांगितल्याप्रमाणे अशा त्या वेदवित् ब्राह्मणांच्या ठिकाणी जेवढ्या कांही देवता आहेत त्या वास करतात. असे सर्व देवतांवर प्रभुत्व असलेले ते ब्राह्मणसुद्धां स्वतःला स्वल्पज्ञच मानीत असत. त्यांना कसलाही गर्व किंवा मत्सर नव्हता. त्या गर्विष्ठ ब्राह्मणांना श्रीगुरू म्हणतात, 'तुम्ही मात्र आचारभ्रष्ट, जातिभ्रष्ट आणि मंत्रभ्रष्ट असून थोडक्याच वेदाभ्यासाने स्वतःला विद्वान् समजता. आपली आपणच स्तुती करता, आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठी ब्राह्मणांचा द्रोह करता आणि आपल्या सरलस्वभावी आत्म्याचीही वंचना करता! पूर्वी जे तुमच्यासारखे झाले त्यांना ब्रह्मराक्षसाच्या योनीत जावे लागले.'४७-४८.

**।। विप्रावूचतुः ।।**

**नैतावच्छ्रोतुमाप्तौ स्वो विवादं कुरु चेन्न वाम् । तच्छक्तिर्जयपत्रं नौ युवाभ्यां दीयतामिति ।।४९।।**
**तथेत्युक्त्वोद्वीक्ष्य यान्तमानयित्वान्त्यजं प्रभुः । लेखा उल्लिख्य सप्ताभ्युत्क्रामयन्तमवाचयत् ।।५०।।**
**प्राचीनसप्तजन्मज्ञो रेखास्पर्शनतोऽभवत् । आद्यां गत्वास्मि बुरडो मातंग इति भाषितम् ।।५१।।**
**द्वितीयां तु किरातोत्थो रावणाख्य इतीरितम् । तृतीयां च नदीतीरस्थो गाङ्गेय इतीरितम् ।।५२।।**

विप्रौ ऊचतुः। 'एतावत् श्रोतुं न आप्तौ स्वः। विवादं कुरु। वां तत्+शक्तिः न चेत् युवाभ्यां नौ जयपत्रम दीयताम्।' इति।४९। प्रभुः 'तथा' इति उक्त्वा यान्तं अन्त्यजं आनयित्वा, सप्ता लेखा उल्लिख्य उत्क्रामयन्तम् अवाचयत्।५०। रेखा+स्पर्शनतः (सः) प्राचीन+सप्त+जन्म+ज्ञः अभवत्। आद्यां गत्वा 'मातंगः बुरुडः अस्मि' इति भाषितम्।५१। द्वितीयां तु 'किरातोत्थः रावणाख्यः' इति ईरितम्। तृतीयां च 'नदी+तीरस्थः गाङ्गेयः' इति ईरितम्।५२।

यावर ते ब्राह्मण म्हणाले, 'हे सगळे ऐकून घ्यायला आम्ही इथे आलो नाही. तुमच्यांत सामर्थ्य असेल तर आमच्याशी वाद करा. अन्यथा तुम्ही दोघे आम्हांला जयपत्र लिहून द्या.'४९. श्रीगुरूंनी 'ठीक तर,' असे म्हणून वाटेवरून जाणाऱ्या एका अंत्यजाला बोलावून घेतले. त्याच्यासमोर जमिनीवर सात रेघा काढून त्याला एकेक रेघ ओलांडायला लावली. प्रत्येक रेघ ओलांडून त्याला त्याची ओळख विचारली.५०. क्रमशः त्या रेघांना स्पर्श करताच त्याला त्या त्या पूर्वजन्माचे ज्ञान झाले. अशा रीतीने सध्याचा जन्म धरून त्याला सात जन्मांचे स्मरण झाले. पहिल्या रेघेवर येतांच तो 'मी मांग असून बुरुडाचा व्यवसाय करतो' असे म्हणाला.५१. दुसऱ्या रेघेशी येतांच तो 'आपण भिल्ल जातीचे असून आपले नांव रावण' असे सांगू लागला. तिसऱ्या रेघेवर तो स्वतःला 'नदीकाठचा कोळी' असल्याचे बोलू लागला.५२.

**चतुर्थीं वै कृषिपटुः शूद्रोऽस्मीत्यभिभाषितम् । पञ्चमीं सोमदत्ताख्यो वैश्योऽस्मीत्युदितं ततः ।।५३।।**
**षष्ठीं गोवर्धनाख्योऽहं क्षत्रः शूर इतीरितम् । सप्तमीं वेदशास्त्रज्ञो ब्राह्मणोऽस्मीति भाषितम् ।।५४।।**
**तदास्य मन्त्रितं भस्म क्षिप्त्वाङ्गे प्रभुराह तम् । चेद्वेदज्ञोऽसि विप्रौ द्राग्विवादेन पराजहि ।।५५।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तौ प्रत्याहितधियौ भिया । कम्पितौ श्रीगुरुं गत्वा विप्रौ शरणमूचतुः ।।५६।।**
**ब्रह्मद्विषौ स्वः पापिष्ठौ दुष्टसङ्गाहितभ्रमौ । मूढौ नौ दुर्गतिं यान्तौ समुद्धर्तुं हरेऽर्हसि ।।५७।।**

चतुर्थीं वै 'कृषिपटुः शूद्रः अस्मि' इति अभिभाषितम्। पञ्चमीं 'सोमदत्ताख्यः वैश्यः अस्मि' इति उदितम्। ततः..।५३। षष्ठीं 'अहं गोवर्धनाख्यः शूरः क्षत्रियः' इति ईरितम्। सप्तमीं 'वेद+शास्त्र+ज्ञः ब्राह्मणः अस्मि' इति भाषितम्।५४। प्रभुः तदा अस्य अङ्गे मंत्रितं भस्म क्षिप्त्वा तं प्राह, 'चेत् वेदज्ञः असि, विप्रौ द्राक् विवादेन पराजहि।'५५। इति ईश+वाक्यं श्रुत्वा तौ भिया प्रत्याहत+धियौ कम्पितौ विप्रौ श्रीगुरुं शरणं गत्वा ऊचतुः।५६। (हे) हरे, नौ ब्रह्म+द्विषौ पापिष्ठौ, दुष्ट+संगा+हित+भ्रमौ मूढौ दुर्गतिं यान्तौ समुद्धर्तुं अर्हसि।५७।

चौथी रेषा ओलांडतांच तो स्वतःला 'शूद्र जातीचा शेतकरी' म्हणवू लागला तर पांचव्या रेषेजवळ 'सोमदत्त नांवाचा वैश्य' असल्याचे सांगूं लागला.५३. सहाव्या रेघेवर तो स्वतः 'गोवर्धन नांवाचा शूरवीर क्षत्रिय' असल्याचे सांगू लागला. शेवटची सातवी रेघ ओलांडतांच तो आपण 'वेदशास्त्र जाणणारे ब्राह्मण आहोत' असे म्हणाला.५४. श्रीदत्तप्रभूंनी त्या अंत्यजाच्या शरीरावर भस्म प्रोक्षण केले आणि त्याला म्हणाले, 'तूं वेदांचा जाणता आहेस ना? तर मग या दोघा ब्राह्मणांशी वाद करून त्यांचा पराभव कर!'५५. हे प्रभूंचे वचन ऐकून त्या ब्राह्मणांची भीतीने गाळण उडाली, बुद्धी काम करीना आणि ते थरथर कांपत श्रीगुरूंना शरण गेले आणि (खालीलप्रमाणे) बोलले.५६. 'पापताप हरणाऱ्या श्रीगुरो! आम्ही ब्रह्मद्वेषी, पापरत, कुसंगतीने मतिभ्रष्ट झालेले मूढ आहोत. आमचा नरकाच्या वाटेवरून उद्धार करा. तेच आपल्या ब्रीदाला शोभून दिसेल.५७.

|| श्रीगुरुरुवाच ||

**म्लेच्छाग्रे पठिता वेदा धिक्कृता ब्राह्मणा यतिः । तत्कर्मपरिपाकार्थं राक्षसौ द्राग्भविष्यथः ||५८||**
**सन्तप्तत्वाद्द्वादशाब्दानुषित्वा शान्तरूपतः । पठ्यमानानुवाकोप-देशाद्विप्राय वां गतिः ||५९||**
**इत्युक्तौ गुरुणा गत्वा भीमां स्नात्वा मृतावुभौ । राक्षसौ गुरुवाक्यात्तौ भूत्वा तत्रैव तस्थतुः ||६०||**
**तत्र यान्द्वादशाब्दान्ते द्विजो विस्मृतवान्मनुम् । तस्मै शशंसतुस्तं तौ तदा मुक्तौ स्वरीयतुः||६१||**

श्रीगुरुः उवाच। 'म्लेच्छ+अग्रे वेदा पठिता, ब्राह्मणा यतिः धिक्कृता। तत्+कर्म+परिपाक+अर्थं द्राक् राक्षसौ भविष्यथः।५८। संतप्तत्वात् शान्तरूपतः द्वादश+अब्दान् उषित्वा, विप्राय पठ्यमान+अनुवाक+उपदेशात् वां गतिः।'५९। इति गुरुणा उक्तौ भीमां गत्वा स्नात्वा उभौ मृतौ। गुरु+वाक्यात् तौ राक्षसौ भूत्वा तत्र एव तस्थतुः।६०। द्वादश+अब्द+अन्ते तत्र यान् द्विजः मनुं विस्मृतवान्। तौ तस्मै तं मंत्रं शशंसतुः। तदा मुक्तौ स्वः ईयतुः।६१।

श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'म्लेच्छ म्हणजे गोमांसभक्षक, धर्मविरुद्ध अति बोलणारा आणि कसलेही आचार न पाळणारा (बोधायनस्मृति). अशांच्या समोर तुम्ही वेदपठण केलेत; वेदांनी (कृ. यजु. तै. संहिता १:७:३:१) ज्यांना प्रत्यक्ष देवतास्वरूप मानले आहे आणि छांदोग्य उपनिषदांत ज्याची निन्दा करण्याला निषेध केला आहे अशा ब्राह्मणांचा धिक्कार तुम्ही केला आहे. संन्यासी हे साक्षात् गुरुस्वरूप आहेत. गुरुगीतेत (१०४) सांगितल्याप्रमाणे 'गुरूंचा अधिक्षेप करणारा आणि ब्राह्मणांना वादाने खाली पाहायला लावणारा निर्मनुष्य अरण्यांत राक्षस होतो.' या सर्व कर्मांच्या फलस्वरूप तुम्हांला तात्काळ ब्रह्मराक्षसांच्या योनीत जावे लागेल.५८ तुम्हांला आत्तां झालेल्या पश्चात्तापामुळे, तुम्ही बारा वर्षे शांत अवस्थेत राहाल. त्यानंतर एका ब्राह्मणाला त्याला न आठवणारा यजुर्वेदांतला अनुवाक सांगण्याने तुम्ही त्या राक्षसयोनीतून मुक्त व्हाल.' इथे उपदेश शब्द योजला असला तरी लाक्षणिक अर्थ 'सांगणे' असाच ग्राह्य आहे.५९. असा श्रीगुरूंचा निरोप मिळतांच ते उभयतां भीमेच्या तीरावर गेले. तिथे स्नान करतांच ते मरण पावले आणि ब्रह्मराक्षस होऊन तिथेच एका झाडावर राहिले.६०. बारा वर्षांनी तिथून जाणाऱ्या एका ब्राह्मणाला मंत्राचे विस्मरण झाले. त्याला त्यांनी तो मंत्र सांगतांच ते राक्षस मुक्त होऊन स्वर्गलोकाला गेले.६१.

**स्वधर्ममुत्सृज्य मदेन ये द्विजान् गुरून्द्विषन्तः खलु राक्षसा वने ।**
**भवन्ति पापोऽपि यदानुतापितः कनिष्ठशिक्षो भवति द्विजाविव ।।६२।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे वेदोपदेशो नाम प्रथमोऽध्यायः ।।१।।**

**आदितश्चतुर्दशोऽध्यायः ।।१४।।**

**सप्ताहपारायणे तृतीयः। अन्ते रसज्ञा वशा.. स्तोत्रं पठनीयम् । अन्यदिने आरंभे गुरुस्तुतिः ।**

ये स्वधर्मं उत्सृज्य मदेन द्विजान् गुरून् द्विषन्तः (ते) खलु वने राक्षसा भवन्ति। पापः अपि यदा अनुतापितः द्विजौ इव कनिष्ठ+शिक्षो भवति।६२।

जे आपला धर्माचार टाकून मदांध होऊन ब्राह्मणांचा आणि गुरूचा द्वेष करतात ते नक्कीच अरण्यांत राक्षस होतात. पापी जरी असला तरी त्याला पश्चात्ताप झाला तर मात्र त्या ब्राह्मणासारखीच त्याची शिक्षा कमी होते.६२.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला पहिला आणि प्रथमपासून चौदावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पञ्चदशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पतितस्य ततो जातं किमु हीनोऽप्यनुग्रहात् । श्रीमद्भगवतो वेद-शास्त्रज्ञोऽस्मीति योऽब्रवीत् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**प्रसादात्सद्गुरोर्ज्ञानी भूत्वाह पतितो हरिम् । ब्राह्मणस्यापि मे कस्मादधःपातोऽभवद्धरे ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**कर्मणा भ्रममाणस्य यन्त्रवत्पुण्यपापतः । प्रकृत्यायत्तचेष्टस्य जन्तोरूर्ध्वमधोगती ।।३।।**

नामधारक उवाच। 'श्रीमद्भगवतः अनुग्रहात् यः वेद+शास्त्र+ज्ञः अस्मि इति अब्रवीत् (तस्य) पतितस्य उ ततो किं जातम्?'१। सिद्ध उवाच। 'सद्गुरोः प्रसादात् ज्ञानी भूत्वा पतितो हरिं आह, (हे) हरे, मे ब्राह्मणस्य अपि कस्मात् अधःपातः अभवत्?'२। श्रीगुरुः उवाच। कर्मणा यन्त्रवत् भ्रममाणस्य प्रकृति+आयत्त+चेष्टस्य जन्तोः पुण्य-पापतः ऊर्ध्वं+अधो+गतिः।३।

**श्रीगणेशाय नमः। अथ पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाक उपदेशुनी पंचादशीं अंत्यजाचे ज्ञान हरिले। यतीला प्रायश्चित्त तसे भस्ममाहात्म्य निरूपिले।।१।।** मागील अध्यायांत माझ्या वर्तनाला प्रमाण मानून लोक तसेच आचरण करतील, हे बरे नव्हे हा श्रीगुरूंचा विचार मांडून वेदांचा अवमान आणि ब्राह्मणांचा अधिक्षेप केल्याने ब्राह्मणाचाही कसा अधःपात होतो ते सांगितले. आता संवादरूपाने दुष्कर्मानि दुर्गती तसेच प्रायश्चित्ताने संशुद्धी कशी होते ते सांगत आहेत.

नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, 'भगवान श्रीगुरूंच्या प्रसादाने अंत्यज असूनही 'मी वेदशास्त्रांचा जाणकार आहे' असे म्हणणाऱ्या त्या पतिताचे पुढे काय झाले?'१. सिद्धमुनी म्हणाले, सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने ज्ञानी झालेला तो अंत्यज पापहर सद्गुरूंना संबोधून म्हणाला, 'मी पूर्वजन्मी ब्राह्मण असूनही मला हा अंत्यजाचा जन्म कां आला?'२. श्रीगुरू त्याला सांगूं लागले. 'कर्माच्या चक्रावर यन्त्राप्रमाणे फिरत असलेल्या, प्रकृतीला अनुसरून विविध कर्मे करणाऱ्या जीवाची पुण्याने ऊर्ध्वगती आणि पापाने अधोगती होते.'३.

**गुरुमातापितृस्त्र्यर्भ-धर्माचारकुलेश्वरान् । यो जहाति मुधा सोऽपि जीवहिंस्रोऽनृतप्रियः ।।४।।**
**खलः कन्याश्वगोक्रेता गृहग्रामवनाग्निदः । त्यक्तश्राद्धः परान्नाशीः कालाप्तातिथिहापकः ।।५।।**
**सद्विप्रदेवतीर्थार्च्य-वेदशास्त्रादिनिन्दकः । तडागकूपारामाध्व-क्रतुध्वंसी व्रताहभुक् ।।६।।**
**श्राद्धार्च्याहाम्बुपर्वाह्नि-स्त्रीभुग्विश्वासघातकः । दत्तदानहरः स्वोक्त-व्यस्ताचारोऽन्यकर्मकृत् ।।७।।**

यो गुरु+माता+पितृ+स्त्री+अर्भ+धर्म+आचार+कुलेश्वरान् मुधा जहाति सः अपि जीव+हिंस्रः अनृत+प्रियः।४। खलः कन्या+अश्व+गो+क्रेता गृह+ग्राम+वन+अग्नि+दः त्यक्त+श्राद्धः परान्नाशीः काल+आप्त+अतिथि+हापकः।५। सत्+विप्र+देव+तीर्थ+अर्च्य+वेद+शास्त्र+आदि+निंदकः; तडाग+कूप+आराम+अध्व+क्रतु+ध्वंसी; व्रत+आह+भुक्; ।६। श्राद्ध+अर्चा+अहे अम्बु+पर्व+अह्नि स्त्रीभुक्; विश्वास+घातकः; दत्त+दान+हरः; स्व+उक्त+व्यस्त+आचारः; अन्य+कर्म+कृत्;।७।

इथे श्रीगुरू बुरुडाने विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरी चंडाल या नीचतम जातीत जन्म घेण्यास कारणीभूत कर्मे सांगत आहेत. गुरू, आई, वडील, पत्नी, (स्वतःचे) मूल, धर्माचे आचरण तसेच कुलदैवत यांचा, निष्कारण त्याग करणारा; जीवांची हिंसा करणारा; असत्य भाषण करणारा;४. दुष्ट माणूस; मुलगी, घोडा किंवा गाय यांना विकणारा; घराला, गांवाला किंवा वनाला आग लावणारा; श्राद्ध न करणारा; परान्नावर जगणारा; जेवणाच्या वेळी आलेल्या अतिथीला हाकलून देणारा;५. साधुसंत, ब्राह्मण, तीर्थ, पूज्य व्यक्ती, वेद, शास्त्र इत्यादींची निंदा करणारा; तलाव, विहीर, बाग, मार्ग, यज्ञ यांचा नाश करणारा;६. श्राद्धाच्या, एकादशी वगैरे व्रताच्या किंवा पूजेच्या दिवशी, पाण्यांत, दर्शादि पर्वकाळांत स्त्रीशी संभोग करणारा; विश्वासघातकी; दान दिलेली वस्तू परत घेणारा; एक बोलून दुसरेच करणारा; आपल्याला अधिकार नसलेले कर्म करणारा;७.

**स्वपुण्यपरपापास्यो दम्भाद्यैः सत्त्वदर्शकः । खलहिंस्रस्तेयिसङ्गी घातज्ञो जारणादिकृत् ।।८।।**
**ज्ञानं विना चिकित्साशी कर्मभ्रष्टोऽन्यतापकृत् । इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डालयोनिगाः ।।९।।**
**क्रोधी शूद्रीरतस्त्यक्तनित्यनैमित्तिकक्रियः । वृषगोवृषलीसक्तोरसगोवेदविक्रयी ।।१०।।**
**अदत्वेशं कपिलगोदुग्धपोऽतिनिषिद्धभुक् । प्रतिग्रही पराजीवजीवी सन्ध्याशयी कुवाक् ।।११।।**
**इत्याद्या ब्राह्मणास्तेऽपि पूर्ववत्संभवन्ति हि । जीवजातिमिताः सन्ति नरका एकविंशतिः ।।१२।।**

स्व+पुण्य+पर+पाप+आस्यः, दम्भ+आद्यैः सत्त्व+दर्शकः, खल+हिंस्र+स्तेयि+संगी, घातज्ञः, जारण+आदि+कृत्,।८। ज्ञानं विना चिकित्साआशीः, कर्मभ्रष्टः, अन्य+ताप+कृत् इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डाल+योनिगाः।९। क्रोधी, शूद्रीरत, त्यक्त+नित्य+नैमित्तिक+क्रियः वृषगः वृषली+सक्तः, रस+गो+वेद+विक्रयी,।१०। ईशं अदत्वा कपिल+गो+दुग्धपः, अतिनिषिद्ध+भुक्, प्रतिग्रही, पराजीव+जीवी, सन्ध्या+शयी कुवाक्।११। इत्याद्या ब्राह्मणाः ते अपि पूर्ववत् संभवन्ति हि। जीवजातिमिताः नरकाः सन्ति। (तेषु) एकविंशतिः।१२।

आपले पुण्य आणि दुसऱ्याचे पाप बोलून दाखविणारा; दंभ वगैरेनी आपल्या साधुत्वाची जाहिरात करणारा; दुष्ट, हिंसक, चोर यांच्या संगतीत असणारा; घातकी; जारण-मारणादि प्रयोग करणारा;८. वैद्यकाचे ज्ञान नसतांना औषधोपचार करून पैसे कमावणारा; आपल्या विहित कर्माचा त्याग करणारा; दुसऱ्यांना पीडा करणारा इत्यादि मृत्यूनंतर नरक भोगून चण्डाल योनीत जन्म घेतात.९. कोपिष्ट, शूद्रस्त्रीशी संग करणारा, नित्य व नैमित्तिक कर्मांचा त्याग करणारा, बैलावर बसणारा, कलावंतिणीवर आसक्त असलेला, विषारी पदार्थ, गाय किंवा वेद यांचा विक्रय करणारा,१०. कपिला गाईचे दूध ईश्वराला अर्पण न करता आपणच पिणारा, कांदा, लसूण इत्यादि अतिनिषिद्ध पदार्थ खाणारा, दुष्टाचे दान घेणारा, दुसऱ्याची उपजीविका हरण करणारा, संध्याकाळी झोपणारा, तोडात सतत शिवीगाळी असणारा,११. इत्यादि ब्राह्मणही वरीलप्रमाणेच नरक भोगून हीन जातीत जन्म घेतात. जीवांच्या योनीइतकेच म्हणजे ८४ लक्ष इतके नरक आहेत.१२.

**तेषु श्रेष्ठा जीवपापविपाका अन्तकालये । तेष्वन्तकः क्षिपत्येतान्पापिनः पापभुक्तये ।।१३।।**
**त्यक्त्वा पुष्टमपीह वर्ष्म कलुषी यान्यातनाङ्गेन तृट्- । क्षुच्छीतोष्णसुपीडितो यमचरैर्बद्धोऽयने दुर्गमे ।।**
**मूर्छन् तर्जनताडनादिभिरसन्वै वैतरिण्यर्दितो । भुङ्क्ते याम्यमवाप्यराष्ट्रमवशस्तां यातनां नारकीम् ।।१४।।**
**ततो योन्यन्तरे याति भुक्तदुःखोऽप्यघांशतः । प्रायशो वासनाभूम्नो भूतप्रेतपिशाचताम् ।।१५।।**

अन्तक+आलये तेषु (एकविंशति) श्रेष्ठाः जीव+पाप+विपाकाः। तेषु अन्तकः पापिनः पापभुक्तये क्षिपन्ति।१३। कलुषी इह पुष्टं अपि वर्ष्म त्यक्त्वा यातना+अङ्गेन यमचरैः बद्धः क्षुत्+शीत+उष्ण+सुपीडितः दुर्गमे अयने यान् असन् तर्जन+ताडनादिभिः मूर्छन् वै वैतरिणी अर्दितः अवशः याम्यं राष्ट्रं अवाप्य तां नारकीं यातनां भुङ्क्ते।१४। ततः भुक्त+दुःखः अपि अघ+अंशतः योनि+अंतरे याति। वासना+भूम्नः प्रायशः भूत+प्रेत+पिशाचतां (याति)।१५।

(पण त्यांतील २१...) जीवांच्या पापांचा परिपाक अशा त्या नरकांतील एकवीस मुख्य आहेत. यमाच्या नगरीत हे सर्व नरक आहेत. यमराज पापी लोकांना त्यांच्या पापाचा भोग देण्यासाठी यांत टाकतो.१३. मृत्यूनंतर पापी जीव आपला स्थूल देह कितीही पुष्ट असला तरी तो इथेच टाकून यातनादेह धारण करतो. यमदूत त्याच्या त्या यातनादेहाला बांधून, तहान, भूक, शीत, उष्ण इत्यादींनी तळमळत, दुर्गम आणि कठीण मार्गाने त्याला ठोकत, मारत, ओढून घेऊन जातात. वैतरिणी नदीतून असह्य कष्ट भोगीत तो पापी जीव विवश होऊन यमाच्या देशात पोचतो. आणि तिथे तो आपल्या पापाला अनुसरून भयंकर आणि अनिर्वाच्य नरकयातना भोगतो.१४. तिथे - यमलोकांत, यातना भोगल्यानंतर अवशिष्ट पापामुळे दुसऱ्या योनीत जन्म घेतो. ज्या जीवांच्या वासना प्रचुर आहेत त्यांना बहुधा भूत, प्रेत किंवा पिशाच योनीत जावे लागते.१५.

**हुंतुंकाराद्गुरोर्विप्राभिभवाद्ब्रह्मराक्षसः । गर्दभो हीनसेवी स्यात् कुक्कुटोऽतिथिहापकः ।।१६।।**
**उष्ट्रोऽर्थहृद्वनचरः फलपत्रार्थहृद्भवेत् । मधु दंशः पलं गृध्रोऽन्नमाखुश्चातको जलम् ।।१७।।**

गुरोः हुं-तुंकारात्, विप्र+अभिभवात् ब्रह्मराक्षसः, हीन+सेवी गर्दभः, अतिथि+हापकः कुक्कुटः स्यात्।१६। अर्थहृत् उष्ट्रः, फल+पत्र+अर्थ+हृत् वनचरः, मधु(हृत्) दंशः, पलं(हृत्वा) गृध्रः, अन्नं (हृत्वा) आखुः, जलं (हृत्वा) चातकः।१७।

**मृत्यूने सर्व कर्मांचा नाश होत नाही. -** एकाच कर्माची परस्परविरोधी अशा विविध योनीत भोगतां येणारी फळे आहेत, तसेच (ब्रह्महत्यादि) एकेका कर्मापासून वेगवेगळ्या अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो, असे शास्त्रवचन आहे. स्थावरादि योनीत गेलेल्या अत्यंत मूढ योनीतील जीवांना वरच्या योनीत जाण्याचे कर्म करतां येत नाही; गर्भावस्थेतच स्राव झालेल्या जीवांकडून कांहीही कर्म घडूंच शकत नाही. म्हणजे या सर्वांचे संसरणच थांबायला हवे. पण तसे होत नाही. त्यामुळे असे निश्चित होते की एकाच जन्मांत सर्वच कर्मांचा उपभोग होऊ शकत नाही. कांही लोक असे म्हणतात की ‘मृत्यूच्या वेळी सर्व कर्मांच्या आधाराचा (वासनांचा) उपमर्द झाल्यावरच नव्या जन्माचा आरंभ होतो. त्यांच्या मते कांही कांही कर्मे (भावी जन्मांच्या) आरंभकत्वाने स्थिर राहतात व कांही जन्मांतराला कारणीभूत होतात हे सयुक्तिक नाही. ‘मरण हे सर्व कर्मांना अभिव्यक्त करते, जसा दिवा आपल्या आसमंतांतील सर्व वस्तूंना अभिव्यक्त करतो. अर्थात् नवा जन्म आरंभ होतांनाच आधीच्या सर्व कर्मांचा नाश होतो.’ हे मत खरे नाही. सर्वाच्या (इथे संपूर्ण कर्माशयाच्या) सर्वात्मकत्वामुळे, देश, काल आणि निमित्त यांच्या मर्यादांमुळे, सर्वात्मनाचा अंशतः उपमर्द किंवा कधी कांही अभिव्यक्ति असे होत नाही. तसेच कर्मांच्या आणि त्यांच्या आश्रयांच्या (वासना) विषयी आहे. पूर्व जन्मी अनुभवलेल्या मर्कट, मनुष्य, मोर इत्यादि जन्मांनी संस्कारित अशा अनेक वासना मर्कट जन्माला कारणीभूत कर्माने - मर्कट जन्माच्या आरंभाने नष्ट होत नाहीत तशीच अन्य जन्मांत प्राप्त झालेली कर्मेही नाश पावत नाहीत हे सयुक्तिकच आहे. मर्कट योनीत जन्म झाल्याने मागील सर्व जन्मांत अनुभवलेल्या वासनांचा नाश होतो असे मानले तर माकडाच्या

**गन्धान् छुच्छुन्दरी धान्यं शलभोऽलिर्विषं तथा । कृमिः कीटः पतङ्गः स्यात् स्वर्णं हृत्वा तृणं पशुः ।।१८।।**
**काको निर्मन्त्रभुग्गृध्रो मित्रध्रुग्दाम्भिको बकः । इत्याद्या बहुशो योनीर्भुक्त्वा रुग्णा भवन्त्यथ ।।१९।।**

गन्धान् (हृत्वा) छुच्छुंदरी, धान्यं शलभः, विषं अलिः, स्वर्णं हृत्वा कृमिः, कीटः, पतङ्गः, तृणं (हृत्वा) पशुः स्यात्।१८। निर्मन्त्र+भुक् काकः, मित्र+ध्रुक् गृध्रः, दाम्भिकः बकः (स्यात्)। इत्याद्या बहुशः योनीः भुक्त्वा अथ रुग्णा भवन्ति।१९।

एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडी मारण्याचे जन्मजात कौशल्य, तसेच आईच्या पोटाला चिकटून राहण्याचे कौशल्य त्याला कुठून आले? ह्या जन्मी तरी त्याचा त्याने अभ्यास केलेला नाही. तसेच या जन्माच्या आधीचा त्याचा जन्म मर्कटाचाच असेल असे सांगतां येत नाही. मृत्यूच्या वेळी 'जीव आपले ज्ञान, कर्म आणि पूर्वानुभव यांना घेऊन जातो' असे बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) म्हटले आहे. यावरून वासनांप्रमाणेच सर्व कर्मांचा उपमर्द होत नाही. ज्या अर्थी शेष कर्म आहे त्या अर्थी त्यापासून अन्यान्य योनीत जन्म घ्यावा लागणार अशी संसाराची उपपत्ती लागते.

गुरूंना 'हुं', 'तुं' इत्यादि अवमानकारक बोलल्याने आणि ब्राह्मणांचा पराभव करण्याने ब्रह्मराक्षसाचा, खालच्या जातीची सेवा करण्याने गाढवाचा तर अतिथीला हाकलणाऱ्यास कोंबड्याचा जन्म येतो.१६.

**चोरीची फळे -** कोणत्या पदार्थाची चोरी केल्याने कोणती योनी मिळते हे पुढे सांगत आहेत. द्रव्य चोरणारा उंट, फळे-पाने चोरणारा वानर, मध चोरणारा गांधिलमाशी, मांस चोरणारा गिधाड, अन्न चोरणारा उंदीर तर पाण्याची चोरी करणारा चातक होतो.१७. गंधचोर चिचुंद्री, धान्यचोर टोळ, विषचोर विंचू, सुवर्णचोर कृमी, कीट वा पतंग आणि गवत चोरणारा पशू होऊन जन्माला येतो.१८. आमंत्रण नसतांना (आगंतुक) जेवणारा कावळा, मित्रद्रोही गिधाड, दंभ करणारा बगळा होतात. अशा अनेक योनीत फिरून उरलेल्या पापांशाने तो इथे मनुष्यजन्मात रोगी होतो.१९.

**हृद्रोगी परहृद्भेत्ता गुरुत्यागी महामयी । क्षयी तु ब्रह्महा कुष्ठी स्वर्णहृत्पुस्तकापहा ।।२०।।**
**जन्मान्धो विश्वासघाती वमी गण्डी गणार्थहृत् । अपुत्रोऽन्यार्थहृद्वस्त्र-हृच्छ्वित्री चानृती कुवाक् ।।२१।।**
**गुल्म्यन्नहृत्कुरुड्मांस-भोक्ता क्वास्यस्तु तैलहृत् । पामी फलादिहृच्छ्वित्री कांस्यकार्पासलोहहृत् ।।२२।।**
**देवार्थहृत्पाण्डुरोगी रोगाः सर्वेऽत्र पापतः । परस्त्र्यालिङ्गनाज्जन्म शतं श्वा तद्भगेक्षकः ।।२३।।**
**अन्धो बन्ध्वङ्गनाभोगी गर्दभोऽहिश्च दुर्धिया । परस्त्र्यालिङ्गनान्नूनं हृद्रोगी ह्यष्टधा रतिः।।२४।।**

पर+हृद्+भेत्ता हृद्+रोगी, गुरु+त्यागी महामयी, ब्रह्महा तु क्षयी, स्वर्ण+हृत् कुष्ठी, पुस्तक+अपहा जन्मांधः,।२०। विश्वास+घाती वमी, गणार्थ+हृत् गण्डी, अन्य+अर्थ+हृत् अपुत्रः, वस्त्र+हृत् श्वित्री च अनृती कुवाक्।२१। अन्नहृत् गुल्मी, मांसभोक्ता कुरुक्, तैलहृत् तु कु+आस्यः, फलादिहृत् पामी, कांस्य+कार्पास+लोह+हृत् श्वित्री।२२। देवार्थहृत् पांडुरोगी, अत्र सर्वे रोगाः पापतः। पर+स्त्री+आलिंगनात् जन्म+शतं श्वा, तत्+भग+ईक्षकः अन्धः,।२३। बन्धु+अङ्गना+भोगी गर्दभः, पर+स्त्री+आलिंगनात् नूनं हृद्+रोगी हि अष्टधा रतिः।२४।

कुणाच्याही मर्मी लागेल असे बोलणाऱ्याला हृदयरोग होतो. गुरूचा त्याग करण्याने कुष्ठरोगी, ब्रह्महत्या करणारा क्षयी तर पुस्तक चोरणारा जन्मांध होतो.२०. विश्वासघातकी वांतिरोगी, सामूहिक द्रव्याचा अपहार करणारा गंडमाळारोगी, परद्रव्यापहारी निपुत्रिक, वस्त्रे चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२१. अन्न चोरणारा गुल्मरोगी (कर्करोगी), मांस खाणारा गलत्कुष्ठी, तेल चोरणारा वांकड्या तोंडाचा, फळे वगैरे चोरणारा त्वचारोगी (खरुज वगैरे), कांसे, कापूस किंवा लोखंड चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२२. देवस्वाचा अपहार करणारा पांडुरोगी होतो. ह्या मनुष्यदेहात सर्वच रोग पापापासून होतात.२३. **व्यभिचार -** आता व्यभिचारकर्माची फळे सांगतात. परस्त्रीला आलिंगन दिले तर तो शंभर जन्म कुत्रा होतो; तिची (परस्त्रीची) योनी पाहिली तर आंधळा होतो; बंधुभार्येशी संभोग करणारा गाढवजन्माला जातो; परस्त्रीला आलिंगन दिले तर हृदयविकार होतो. नुसत्या आलिंगनानेही कसे पाप लागते याचे स्पष्टीकरण म्हणून रतीचे (कामक्रीडेचे) आठ प्रकार असतात असे स्पष्ट केले आहे. स्मरण, कीर्तन, क्रीडा, प्रेक्षण, उत्साह, अध्यास आणि प्रत्यक्ष संभोग असे आठ मैथुनाचे प्रकार अग्निपुराणांत वर्णिले आहेत. (*'स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणं। उत्साहोऽध्यवसायच क्रियानिष्पत्तिरेव च'।।३१०:९-१०)*२४.

**श्वा मातुलसखिस्त्रीभुक् कृमिः स्यादौपपत्यतः । स्वैरिण्योऽपि स्त्रियः श्वादि-योनिं गत्वा व्यथन्त्यलम् ।।२५।।**
**इति संवादमाकर्ण्य गुरुं प्राह त्रिविक्रमः । ज्ञानाद्वाऽज्ञानतो जातं कथं पापं प्रणश्यति ।।२६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पश्चात्तापेन संशुद्धिः प्रायश्चित्तादिभिः पुनः । सदस्युच्चार्य पापं स्वं ब्रह्मदण्डं निधाय च ।।२७।।**
**सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृतपापानुसारतः । कृच्छ्राब्दादि चरेच्छक्त्याऽशक्तो गोऽर्घादिनाऽशठः।।२८।।**

मातुल+सखि+स्त्रीभुक् श्वा, औपपत्यतः कृमिः स्यात्। स्वैरिण्याः स्त्रिया अपि श्वादि योनिं गत्वा अलं व्यथन्ति।२५। इति संवादं आकर्ण्य त्रिविक्रमः गुरुं प्राह, ज्ञानात् वा अज्ञानता जातं पापं कथं प्रणश्यति?२६। श्रीगुरुः उवाच। 'पश्चात्तापेन, पुनः प्रायश्चित्तादिभिः संशुद्धिः। सदसि स्वं पापं उच्चार्य, ब्रह्मदंडं च निधाय,।२७। सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृत+पाप+अनुसारतः शक्त्या चरेत्। अशक्तः गो-अर्घ-आदिना अशठः (चरेत्)।'२८।

मामाच्या किंवा मित्राच्या स्त्रीशी संभोग केल्यास कुत्र्याचा जन्म तसेच व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना कृमीचा जन्म मिळतो. स्वैराचारी स्त्रियासुद्धा श्वानादि योनीत जाऊन अतिशय कष्ट भोगतात.२५.

**प्रायश्चित्त -** हा संवाद ऐकून त्रिविक्रम मुनींनी श्रीगुरूंना विचारले, कळत वा न कळत घडलेल्या पापाचा नाश कसा करतां येईल?

श्रीगुरू सांगत आहेत. पश्चात्तापाने तसेच प्रायश्चित्ताने उत्तम प्रकारे पापाची शुद्धी होते. विद्वान् ब्राह्मणांच्या सभेत प्रथम गाय, बैल किंवा द्रव्यस्वरूपांत ब्रह्मदंड द्यावा आणि आपल्या पापाचा उच्चार करावा.२७. नंतर सभेच्या आज्ञेने क्षौरपूर्वक केलेल्या पापाच्या तारतम्याने शक्त्यनुसार अब्दादि (वर्षभर आचरायचे) कृच्छ्रे अनुष्ठावीत. तेवढे अनुष्ठान करण्याची शक्ती नसेल तर गोदान करावे अथवा गाईच्या मूल्याएवढे द्रव्य दान करावे. किंवा निष्क (साडेबारा ग्रॅम) वा शक्य तेवढे सोने निष्कपटपणे द्यावे.२८.

**स्वल्पं तीर्थे दशस्नानाद् द्विशतास्वायमैरघम् । स्वर्णदानात्प्रणश्येत सद्गुरोर्दर्शनान्महत् ।।२९।।**
**त्र्यहं दिवा त्र्यहं सायं त्र्यहमद्यादयाचितम् । नाद्यात् त्र्यहं कायकृच्छ्रोऽयुतगायत्रिकाजपात् ।।३०।।**
**सहस्रहवनाद्वापि द्वादशद्विजभोजनात् । गोदानाच्छक्तितोऽर्घाद्वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति ।।३१।।**
**द्वादशद्युः पञ्चदश-ग्रासा भोज्याः सदा निशि । मासाच्छुद्धिः स्वल्पभुज्या क्षीराज्याद्याशनैश्च वा ।।३२।।**

स्वल्पं अघं तीर्थे दश+स्नानात्, द्विशत+असुयामैः (वा) प्रणश्येत्। महत् (पापं) स्वर्णदानात् सद्गुरोः दर्शनात् (वा) प्रणश्येत।२९। त्रि+अहं दिवा त्र्यहं सायं, त्र्यहं अयाचितं अद्यात्, त्र्यहं न अद्यात् कायकृच्छ्रः, अयुत+गायत्री+जपात् (वा)।३०। सहस्र+हवनात् वा, द्वादश द्विज+भोजनात्, गोदानात्, शक्तितः अर्घात् वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति।३१। द्वादश+द्युः पञ्चदश ग्रासाः भोज्याः, सदा निशि स्वल्पभुज्या मासात् शुद्धिः, क्षीर+आज्य+अशनैः च वा (शुद्धिः)।३२।

लहानसहान पापे तीर्थांत दहा स्नाने (प्रत्येक स्नानानंतर केस वाळेपर्यंत थांबून) केल्याने तसेच दोनशे प्राणायामांनी नष्ट होतात. महापाप सुवर्णदानाने किंवा सद्गुरूंच्या दर्शनाने नाश पावते.२९.

**प्राजापत्य कृच्छ्र -** तीन दिवस दिवसा, तीन दिवस रात्री आणि तीन दिवस अयाचित भोजन करून तीन दिवस उपोषण करावे म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होते; किंवा याचा पर्याय म्हणून दहा हजार गायत्रीचा जप करावा;३०. किंवा गायत्री मंत्राचे हजार तुपाच्या आहुतींचे हवन करावे; किंवा बारा ब्राह्मणांना भोजन द्यावे; तसे गाईचे किंवा शक्त्यनुसार तितक्या मूल्याचे दान करावे म्हणजेही प्राजापत्य कृच्छ्र संपन्न होते.३१. पंधरा घास दिवसा आणि बारा घास रात्री अन्न घ्यावे; किंवा महिनाभर रात्री अल्प (अंजुळी) आहार करावा; किंवा दूध-तुपावर राहावे म्हणजे शुद्धी होते.३२.

**बिल्वाश्वत्थाब्जदर्भाम्बु-पानात् तीर्थाटनादपि । वाराणसीस्नानमात्राल्-लीयन्ते पापकोटयः ।।३३।।**
**अन्यतीर्थे त्वनुष्ठानाद्रामेश्वरसमीपतः । अब्धिस्नानाद्ब्रह्महत्या-कृतघ्नाद्यघसंहृतिः ।।३४।।**
**लक्षसंख्याकगायत्री-जपान्मद्यपसंशुचिः । कोट्या ब्रह्मघ्नोऽष्टलक्षैर्गुरुतल्पगतस्य च ।।३५।।**
**सप्तलक्षात्स्वर्णहर्तुः पावमानीभिरप्युत । इन्द्रं मित्रं शुनःशेप-सूक्तं पौरुषशान्तिके ।।३६।।**
**त्रिसुपर्णं नाचिकेतमघमर्षणवैष्णवे । मासमात्रं जपेत्स्वल्पे षण्मासं च महत्यघे ।।३७।।**

बिल्व+अश्वत्थ+अब्ज+दर्भ+अंबु+पानात् तीर्थ+अटनात् अपि, वाराणसी+स्नान+मात्रात् पापकोटयः लीयन्ते।३३। अन्यतीर्थे तु अनुष्ठानात्। रामेश्वर+समीपतः अब्धि+स्नानात् ब्रह्महत्या+कृतघ्नादि अघ+संहृतिः।३४। लक्ष+संख्याक+गायत्री+जपात् मद्यप+संशुचिः। कोट्या ब्रह्मघ्नः, अष्टलक्षैः गुरु+तल्प+गतस्य च (शुद्धिः)।३५। सप्तलक्षात् स्वर्णहर्तुः (शुचिः)। पावमानीभिः अपि उत 'इंद्रं मित्रं', 'शुनःशेप', पौरुष+शांतिके।३६। त्रिसुपर्णं, नाचिकेतं, अघमर्षण+वैष्णवे, स्वल्पे (अघे) मासमात्रं जपेत्। महति अघे च षण्मासं जपेत्। ३७।

बेल, पिंपळ, कमळ यांच्या पानांनी किंवा कुशोदकाचे पाणी रोज घेऊन उपवास केल्याने पर्णकृच्छ्र होते. तसेच तीर्थयात्रांनी आणि काशीला गंगास्नानाने पापांच्या कोटी लयाला जातात.३३. अन्य तीर्थांत मात्र अनुष्ठानानेच पापनाश होतो. रामेश्वरासन्निध समुद्रस्नान केल्याने ब्रह्महत्या, कृतघ्नता इत्यादि पापांचा नाश होतो.३४.

**वेदमंत्रांनी शुद्धी -** एक लाख गायत्रीमंत्राचा जप केल्याने मद्यपानाचे पाप जाते. एक कोटी जपाने ब्रह्महत्येपासून, आठ लाखांनी गुरुतल्पगमनाच्या पापाची शुद्धी होते. (गायत्रीच्या) सात लाख जपाने सुवर्णचोरीच्या पापाची शुद्धी होते. सर्व पवमान सूक्ताच्या (*'स्वाधिष्ठया'*पासून *'क्षीरं सर्पिर्मधूदकं'* पठणाने शुद्धी आहे. किंवा 'इंद्रं मित्रं' या एका मंत्राचा जप करावा. तसेच *'शुनःशेप'*सूक्त, पुरुषसूक्त किंवा शांतिसूक्त (*'शं न इंद्राग्नि'* ह्या पंधारा ऋचा) हे पाठ करावेत.३६. नारायणीय उपनिषदांतील त्रिसुपर्ण (भोजनाच्या आरंभी म्हटले जाणारे), कठ उपनिषत्, अघमर्षणाचे मंत्र किंवा *'अतो देवा'* इत्यादि विष्णुमंत्र लहानसहान पापांच्या परिमार्जनासाठी महिनाभर जपावेत. मोठ्या पापासाठी सहा महिने जप करावा.३७.

**चान्द्रायणं चरेद्ग्रासानेकैकं वर्धयेत्सिते । पक्षेऽन्यके ह्रासयेत्तैः शुचिगव्याशनेन च ।।३८।।**
**गोमूत्रं गोमयं क्षीरं दध्याज्यं सकुशोदकम् । मिलित्वा मन्त्रवद्धुत्वा पिबेत्सर्वाघशान्तये ।।३९।।**
**उभौ समं ह्यनन्तर-कृताघेणापि दम्पती । लिप्यते पापिसंसर्गी सोऽपि पापी भवेत्समः ।।४०।।**
**प्रायश्चित्तानि चीर्णानि दुष्टं हरिपराङ्मुखम् । नदीव सौरभाण्डं न निष्पुनन्ति कथञ्चन ।।४१।।**

चान्द्रायणं चरेत्। सिते पक्षे एक+एकं ग्रासान् वर्धयेत्। अन्यके ऱ्हासयेत्। तैः शुद्धिः। (पंच)गव्य अशनेन च।३८। गोमूत्रं, गोमयं, क्षीरं, दधि, आज्यं सकुश+उदकं मिलित्वा मन्त्रवत् हुत्वा सर्वाघ+शान्तये पिबेत्।३९। दुष्टं हरि+पराङ्+मुखं चीर्णानि प्रायश्चित्तानि न निष्पुनन्ति। नदी सौरभाण्डं इव।४०। अनन्तर+कृत+अघेण उभौ अपि दम्पती समं लिप्यते। पापी+संसर्गी सः अपि समः पापी भवेत्।४१।

**चांद्रायण** व्रतानेसुद्धां शुद्धी होते. शुक्ल पक्षाच्या प्रतिपदेला एक घास भोजन करायचे आणि मग चंद्राच्या कलेनुसार एक एक घास वाढवीत पौर्णिमेला पंधरा घासाचे भोजन करायचे. एक घास कोंबडीच्या किंवा मोराच्या अंड्याएवढा किंवा ओल्या आंवळ्याएवढा असावा. कृष्ण पक्षात परत एक एक घास कमी करीत अमावस्येला पूर्ण उपोषण करायचे. याला यवमध्य चांद्रायण असे म्हणतात. याउलट पौर्णिमेला पंधरा घास घेऊन एक एक घास कमी करीत अमावास्येला उपोषण करून पुन्हा शुक्ल पक्षात एक एक घास वाढवीत जाणे याला पिपीलिकामध्य चांद्रायण असे नाव आहे. यांत पूर्ण महिन्यांत एकूण २४० घास घेतले जातात. याला पर्याय म्हणून कुणी रोज चार चार घासांचे जेवण दोन वेळा (शिशुचांद्रायण) किंवा आठ घास एक वेळा (यतिचांद्रायण) घेतात. पंचगव्यानेही शुद्धी होतेच ते पुढच्या श्लोकांत वर्णिले आहे.३८.

**पंचगव्य** गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप हे पांच (पंचगव्य) कुशजलांत मिसळून अभिमंत्रित करून प्याल्याने सर्व पापांची शांती होते.३९. पती-पत्नीमध्ये एकाने पाप केले तरी दोघांनाही सारखाच दोष लागतो. तसेच पापी माणसाशी संसर्ग ठेवणाराही एका वर्षांत तेवढाच पापी होतो.४०. बंद तोंडाची दारूची बाटली जशी नदीत कितीही बुचकळली तर शुद्ध होत नाही, त्याचप्रमाणे अश्रद्ध, ईश्वरपराङ्मुख आणि भक्तिहीन दुष्टाने कितीही प्रायश्चित्ते आचरली तरी तो शुद्ध होत नाही.४१.

**इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा पतितं प्राह सद्गुरुः । प्राङ्मातापितृसंत्यागाल्लब्धा चण्डालताऽत्र ते ।।४२।।**
**मासमात्रं नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि । प्राहान्त्यजो योजय मां त्वद्दृक्पूतं द्विजातिषु ।।४३।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भूत्वापि पतिताद्वृद्धो देहस्तेऽसंस्कृतोऽशुचिः । वदन्ति पतितं न त्वामन्यत्प्रोक्तं कथं त्वया ।।४४।।**
**विश्वामित्रः पुरा क्षत्रो देवर्षित्वं तपोबलात् । देवान्ययाचे प्रोक्तं तैर्वसिष्ठात्स्वीकुरुष्व तत् ।।४५।।**

इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा सद्गुरुः पतितं प्राह। 'प्राक् माता+पितृ+संत्यागात् ते अत्र चण्डालता।४२। मासमात्र नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि।' अन्त्यजः प्राह, 'त्वत्+दृक्+पूतं मां द्विजातिषु योजय।'४३। श्रीगुरुः उवाच। 'पतितात् भूत्वा वृद्धः अपि ते देहः असंस्कृतः। त्वां पतितं अशुचिः वदन्ति। त्वया अन्यत् कथं प्रोक्तम्?'४४। पुरा क्षत्रः विश्वामित्रः तपो+बलात् देवान् देवर्षित्वं ययाचे। तैः प्रोक्तं 'तत् वसिष्ठात् स्वीकुरुष्व।'४५।

हे सर्व त्रिविक्रम स्वामींना सांगून समोरच्या चांडालाला सद्गुरू म्हणाले, 'पूर्वी मागील सातव्या जन्मांत तू आपल्या आई-वडिलांना टाकून दिल्याने ह्या जन्मांत तुला चांडाल योनी आली आहे.४२. एक महिनाभर नदीवर स्नान केल्याने तू शुद्ध होऊन मृत्यूनंतर ब्राह्मण जन्म पावशील.' त्यावर तो अंत्यज म्हणाला, 'आपल्या दृष्टिपाताने मी पवित्र झालो आहे. आतां मला ब्राह्मणांत मिळवून घ्या!'४३. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंत्यजापासून झालेल्या आणि त्याच ठिकाणी वाढलेल्या तुझ्या ह्या देहावर कसलेही संस्कार झाले नाहीत व होऊ शकत नाहीत. यासाठी तुला अस्पृश्य मानतात. तू हे भलतेच काय बोलतोस?'४४. 'पुरातन काळी क्षत्रिय कुळांत जन्म घेतलेल्या विश्वामित्राने आपल्या तपोबलाच्या आधारे देवांना आपल्याला ऋषित्व (ब्राह्मणत्व) देण्याची मागणी केली. देवांनी त्याला ते वसिष्ठ ऋषीकडून मान्य करून घ्यायला सांगितले.४५.

**वसिष्ठेनापि हीनत्वान्न दत्तं तत्सुतान्छतम् । हत्वा तं हन्तुकामोऽभूच्छङ्कितो ब्रह्महत्यया ।।४६।।**
**तदाज्ञया तपस्तप्तं तत्तु मेनकया हृतम् । विश्वामित्रः पुनस्तप्त्वा दग्धाङ्गोऽभूदृषीश्वरः ।।४७।।**
**तस्माद्भवान्तरे तेऽस्तु ब्रह्मत्वं गच्छ तेऽस्तु शम् ।।४८।।**

**।। पतित उवाच ।।**

**जाते स्वर्णेऽयसः पश्चात्कुतोऽयस्तद्वदप्यहम् ।।४९।।**

वसिष्ठेन अपि हीनत्वात् (तं देवर्षित्वं) न दत्तम्। (विश्वामित्रः) तत् सुतान् शतं हत्वा तं हन्तु+कामः अभूत्। ब्रह्महत्यया शङ्कितः।४६। तत् आज्ञया तपः तप्तम्। तत् तु मेनकया हृतम्। विश्वामित्रः पुनः तप्त्वा दग्ध+अङ्गः ऋषि+ईश्वरः अभूत्।४७। 'तस्मात् भव+अंतरे ते ब्रह्मत्वं अस्तु। गच्छ ते शं अस्तु।'४८। पतित उवाच। 'अयसः स्वर्णे जाते पश्चात् कुतः अयसः? तत् वत् अहं अपि।'४९।

वसिष्ठ ऋषींनीही त्याचा जन्म हीनकुळांत झाल्याने त्याला देवर्षित्व दिले नाही. तेव्हा विश्वामित्राने क्रोधाने त्याचे शंभर पुत्र ठार मारले. तो वसिष्ठांनाही मारायला उद्युक्त झाला; पण ब्रह्महत्येचा दोष लागेल या आशंकेने थांबला.४६. त्याच वसिष्ठांच्या आज्ञेने त्याने आणखी तप केले. पण इंद्राने पाठविलेल्या मेनकेने त्याचे हरण केले. विश्वामित्राने पुनः तसेच तप शरीर जळेपर्यंत केले आणि नूतन शरीर धारण करून तो ब्रह्म ऋषीची पदवी पावला.४७. एवढ्यासाठी या जन्मात नाही तरी पुढच्या जन्मात तू ब्राह्मण होशील. जा, तुझे कल्याण असो!४८. त्यावर पतित म्हणाला, 'एकदां लोखंडाचे सोन्यांत रूपांतर झाल्यावर ते पुन्हां लोखंड कसे होईल? त्याचप्रमाणे माझेही आहे. एकदा ब्राह्मण झाल्यावर मी परत चांडाल कसा होऊ?' ४९.

**तच्छ्रुत्वा श्रीगुरुर्विप्र-भ्रान्त्या दूरात्स्त्रियं सुतान् । वारयन्तं वीक्ष्य शिष्यमाहामुं स्नापय द्रुतम् ।।५०।।**
**तदा लुब्धद्विजेनैष स्नापितः पतितः स्वकैः । सहागाद्विस्मृतप्राप्त-ज्ञानो हीनो निजालयम् ।।५१।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**पतितोऽपि कृपादृष्ट्या पावितः स्नानमात्रतः । कथं स पूर्ववज्जातो भगवन्छिन्धि संशयम् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**क्षिप्तं भस्मार्पितं ज्ञानं विनष्टं क्षालनात्तु तत् । इयान् भस्मप्रभावः प्राग्वामदेवो महामुनिः ।।५३।।**

तत् श्रुत्वा (तथा) विप्र+भ्रांत्या स्त्रियं, सुतान् दूरात् वारयन्तं (तं पतितं) वीक्ष्य श्रीगुरुः शिष्यं आह, 'अमुं द्रुतं स्नापय।'५०। तदा लुब्ध+द्विजेन एष पतितः स्नापितः। विस्मृत+प्राप्त+ज्ञानः हीनः स्वकैः सह निजालयं अगात्।५१। त्रिविक्रम उवाच। 'पतितः अपि कृपा+दृष्ट्या पावितः। सः स्नान+मात्रतः कथं पूर्व+वत् जातः? भगवन् संशयं छिन्धि।'५२। श्रीगुरुः उवाच। 'भस्म क्षिप्त्वा ज्ञानं अर्पितं तत् तु क्षालनात् विनष्टम्। इयान् भस्म+प्रभावः। प्राक् वामदेवः महामुनिः वने चचार।५३।

त्याचे ते बोलणे ऐकून व तो आपल्याला बोलावणाऱ्या पत्नी व मुलांना दुरूनच परतवत असलेला पाहून श्रीगुरू शिष्याला म्हणाले, 'याला लवकर आंघोळ घाला!'५०. मग एका लोभी ब्राह्मणाने त्या पतिताला स्नान घातले. तेव्हा त्या चांडालाला आधी झालेले ज्ञान नष्ट झाले व तो कुटुंबीयांसह आपल्या घरी गेला.५१. हे सर्व पाहत असलेल्या त्रिविक्रम स्वामींनी श्रीगुरूंना विचारले, 'आपल्या कृपादृष्टीच्या प्रभावाने पावन झालेला हा चांडाल केवळ स्नानानेच कसा पहिल्यासारखा झाला? भगवंता, आपण ह्या माझ्या शंकेचे समाधान करावे.'५२. श्रीगुरू म्हणाले, 'भस्म टाकून त्याला ज्ञान दिले. भस्म धुवून टाकल्याबरोबर ते नाहीसे झाले! हा सगळा भस्माचा प्रभाव आहे.' श्रौत असो वा स्मार्त असो, कोणतेही कर्म करतांना भस्म धारण करणे आवश्यकच असते. त्याची आवड निर्माण व्हावी म्हणून भस्ममाहात्म्याचे पूर्व इतिहासासहित वर्णन करीत आहेत. पूर्वीच्या काळी वेदांनी गौरविलेले वामदेव महर्षि,५३.

**वने चचार तं प्रात्तुमागतो ब्रह्मराक्षसः । स्पर्शमात्रात्प्रशान्तोऽभूज्ज्ञाताऽखिलनिजोद्भवः ।।५४।।**

**।। ब्रह्मराक्षस उवाच ।।**

**प्राक्श्रीमत्तोऽस्मि राट्कामी ब्राह्मणाद्यन्तजातिजाः । भुक्ताः श्रेष्ठाः स्त्रियोऽल्पाश्च सहैकैकामनन्तशः ।।५५।।**
**हठाद्दानादिनानीय भुक्ता मद्राष्ट्रसंस्थिताः । नरा राष्ट्रान्तरं जग्मुः सस्त्रीका दोषकातराः ।।५६।।**
**ततो रुग्णस्य मे राज्यमाक्रान्तं शत्रुभिस्ततः । कृच्छ्रात्प्रेत्य मया भुक्ता पितृभिः सह दुर्गतिः ।।५७।।**

तं प्रात्तुं ब्रह्मराक्षसः आगतः। (सः वामदेवस्य अङ्ग) स्पर्शात् प्रशांतो अखिल+निज+उद्भवः ज्ञाता अभूत्।'५४। ब्रह्मराक्षस उवाच। 'प्राक् श्रीमत्तः कामी राट् अस्मि। ब्राह्मण+आदि+अंत्य+जातिजाः श्रेष्ठाः अल्पाः च स्त्रियाः एक+एकाम् सह अनन्तशः भुक्ताः।५५। हठात् दानादिना आनीय भुक्ताः। मत्+राष्ट्र+संस्थिताः नराः दोष+कातराः सस्त्रीकाः राष्ट्र+अंतरं जग्मुः।५६। ततः मे रुग्णस्य राज्यं शत्रुभिः आक्रान्तम्। ततः कृच्छ्रात् प्रेत्य मया पितृभिः सह दुर्गतिः भुक्ता।५७।

एकदां गहन वनात संचार करीत असताना त्यांना खाण्यासाठी एक ब्रह्मराक्षस त्यांच्यावर धांवून आला. पण त्यांचा अंगस्पर्श होतांच त्याचा सगळा त्वेष जाऊन तो एकदम शांत झाला. तसेच त्याला आपल्या सर्व पूर्वजन्मांची स्मृतीही आली.५४. ब्रह्मराक्षस वामदेवांना सांगूं लागला. 'पूर्वजन्मी मी संपत्तीने माजलेला कामासक्त असा राजा होतो. ब्राह्मणापासून अगदी हीनयातीत जन्मलेल्या, प्रौढ, अल्पवयीन, वयांतही न आलेल्या स्त्रियांचा मी भोग घेतला. एकदा भोगून झाल्यावर मग त्यांची विचारपूसही केली नाही.५५. पैशांनी वगैरे त्या आल्या नाहीत तर बलात्काराने मी धरून आणून त्यांचा उपभोग घेत असे. त्यामुळे माझ्या राज्यांतील लोक हा जातिसंकराचा दोष टाळण्यासाठी म्हणून आपापल्या स्त्रियांना घेऊन परराष्ट्रांत जाऊन राहिले.५६. पुढे मी व्याधिग्रस्त झालो असता शत्रूंनी माझे राज्य हिरावून घेतले. मला कष्टप्रद मरण आले. मृत्यूनंतर मला माझ्या पितरांसह नरकवास भोगावा लागला.'५७.

**प्रेतो व्याघ्रश्चाजगरः सालावृक उ सूकरः । शरठः श्वा क्रोष्टुमृगौ कुक्कुटः कपिचिल्लकौ ।।५८।।**
**नकुलः काक ऋक्षश्च कुक्कुटः खर ओतुकः । भेकः कूर्मो मत्स्य आखुर्घूको हस्तीह राक्षसः ।।५९।।**
**एता योनीर्मया भुक्ताः कृच्छ्रात्क्षुत्तृट्प्रपीडितः । त्वामत्तुमागमन् सद्यः शान्तो जातोऽस्म्यदः कथम् ।।६०।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**अङ्गे भस्मास्ति तत्स्पर्शाज्ज्ञानं जातं तवादितः । तन्माहात्म्यमिदं यत्तु सदा प्रीत्या शिवो दधौ ।।६१।।**
**पुरैको द्राविडे विप्र औपपत्ये हतो बहिः । त्यक्तस्तत्रैव भस्माक्त-श्वस्पर्शाद्भस्मभूषितः ।।६२।।**

'प्रेतः, व्याघ्रः, अजगरः, सालावृकः उ सूकरः, शरठः, श्वा, क्रोष्टु+मृगौ, कुक्कुटः, कपि+चिल्लकौ,।५८। नकुलः, काकः, ऋक्षः, च कुक्कुटः खरः, ओतुकः, भेकः, कूर्मः, मत्स्यः, आखुः, घूकः, हस्ती, इह राक्षसः।५९। एता योनीः मया कृच्छ्रात् भुक्ताः। सद्यः क्षुत्+तृट्+प्रपीडितः त्वां अत्तुं आगमन् शान्तः जातः अस्मि। अदः कथम्?'६०। वामदेव उवाच। 'अङ्गे भस्म अस्ति। तत्+स्पर्शात् तव आदितः ज्ञानं जातम्। इदं तत्+माहात्म्यं यत् तु शिवः सदा प्रीत्या दधौ।६१। पुरा द्राविडे एकः विप्रः औपपत्ये हतः बहिः त्यक्तः। तत्र एव भस्माक्त+श्व+स्पर्शात् (सः) भस्मभूषितः।६२।

पिशाच, वाघ, अजगर, खोकड, डुक्कर, सरडा, कुत्रा, कोल्हा, कोंबडा, वानर, घार,५८. मुंगूस, कावळा, अस्वल, रानकोंबडा, गाढव, मांजर, बेडूक, कासव, मासा, उंदीर, घुबड, हत्ती आणि शेवटी आत्तांचा हा ब्रह्मराक्षस,५९. इतक्या योनींत जन्मून मला कष्ट भोगावे लागले. तहान-भुकेने कासावीस होऊन आज मी तुम्हांला खाण्यासाठी धांवून आलो असता मी एकदम शांत झालो. हे असे कसे झाले?६०. वामदेव त्याला म्हणाले, 'माझ्या अंगावर जे भस्म आहे त्याच्या स्पर्शामुळे (तूं शांत होऊन) तुला सर्व पूर्वीचे ज्ञान झाले. त्या भस्माचेच हे माहात्म्य आहे जे साक्षात् भगवान् शंकर सदा प्रेमपूर्वक धारण करतात.६१. पूर्वी द्रविड देशामध्ये एक ब्राह्मण व्यभिचारावरून झालेल्या भांडणांत मारला गेला व त्याला गावाबाहेर टाकण्यांत आले. तिथे भस्माने माखलेल्या कुत्र्याच्या स्पर्शाने ते भस्म त्याच्या शरीराला लागले.६२.

**असून्जहौ तदा प्राप्तान्याम्यान्दूतान्निवार्य तम् । भस्मदग्धमलं शैवा दूता निन्युः शिवान्तिकम् ।।६३।।**

**।। राक्षस उवाच ।।**

**एवं चेद्भस्ममाहात्म्यं तत्स्वीकर्तुं समुत्सहे । तन्निर्माणप्रकारं मे शंस धार्यं कथं च तत् ।।६४।।**
**प्राग्ब्रह्मभ्योऽर्पिता वार्ता वाप्याद्या निर्जलस्थले । रचितास्तत्फलं त्वेतत्पापान्ते तव दर्शनम् ।।६५।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**त्र्यक्षं सायुधपङ्क्तिहस्तमहिसत्सूत्रं शिवं श्वेतभं, पञ्चास्यं च कपर्दिनं स्मितमुखं वैय्याघ्रचर्माम्बरम् ।**
**चार्वम्बान्वितमिन्दुभालमु शिरोगङ्गं गणाद्यन्वितम्, स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमारमुनिराण्नत्वाऽब्रवीत्प्राञ्जलिः ।।६६।।**

असून् जहौ। तदा प्राप्तान् याम्यान् दूतान् निवार्य शैवाः दूताः तं भस्म+दग्ध+मलं शिव+अन्तिकं निन्युः।'६३। राक्षस उवाच। 'एवं भस्म+माहात्म्यं चेत् तत् स्वीकर्तुं समुत्सहे। तत्+निर्माण+प्रकारं, तत् च कथं धार्यं मे शंस।'६४। प्राक् ब्रह्मभ्यः वार्ता अर्पिता, निर्जल+स्थले वापी+आद्याः रचिताः। एतत् पाप+अन्ते तव दर्शनं तत्+फलम् (अस्ति)।'६५। वामदेव उवाच। 'त्रि+अक्षं स+आयुध+पंक्ति+हस्तं अहि+सत्+सूत्रं, श्वेतभं, पञ्च+आस्यं, कपर्दिनं च स्मित+मुखं, वैयाघ्र+चर्म+अम्बरं, चारु+अम्बा+अन्वितं, इन्दु+भालं उ शिरो+गङ्गं, गण+अन्वितं शिवं स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमार मुनि+राट् नत्वा प्राञ्जलिः अब्रवीत्।'६६।

भस्मामुळे त्याची पापे धुतली गेल्याने, त्याला न्यायला आलेल्या यमदूतांना परतवून शिवदूतांनी त्याला शिवलोकांत नेले.६३. ब्रह्मराक्षस म्हणाला, एवढं भस्माचे माहात्म्य ऐकून मलाही ते धारण करावे अशी स्फूर्ती होत आहे. ते कसे तयार करावे आणि कसे लावावे ते मला आपण सांगा.६४. पूर्वी मी ब्राह्मणांच्या उपजीविकेसाठी भूमी दान केली होती; तसेच पाणी नसलेल्या ठिकाणी विहिरी खणविल्या होत्या. पापाचा भोग सरल्यावर झालेले आपले दर्शन हे त्याचेच फळ आहे.६५. वामदेव सांगू लागले, 'त्रिनेत्र, आयुधे धारण केलेल्या दहा भुजा, नागाचे यज्ञोपवीत धारण केलेल्या शुभ्र धवल वर्णाच्या, पंचमुखी, कवड्यांनी सुशोभित, सुहास्यवदन, व्याघ्राजिन पांघरलेल्या, वामांकी त्रैलोक्यमोहिनी पार्वतीमातेला घेतलेल्या कपाळावर चंद्र मिरविणाऱ्या तसेच शिरी गंगा धारण केलेल्या, गणसमूहांनी वेष्टिलेल्या भगवान शिवांना प्रसन्नचित्त पाहून मुनिश्रेष्ठ सनतकुमार नमस्कार करून हात जोडून त्याना म्हणाले.६६.

**जयेश्वरानन्त हराज शंभो जगन्निदानाल्पकसाधनं नः ।**
**मुक्त्यै शिवोपादिश दुष्कराणि प्रोक्तानि सर्वाणि तु साधनानि ।।६७।।**

**।। शिव उवाच ।।**

**दर्शनात्परिहृत्याघं भुक्त्वा शं विधिवद्धृतेः । भस्मनः पुरुषोऽह्नाय जीवन्मुक्तो भवत्यलम् ।।६८।।**
**यज्ञोत्थं वा करीषोत्थमग्निरित्यादिमन्त्रितम् । धार्यं त्र्यायुषमित्येतैरङ्गुलीभिः प्रतिस्थलम् ।।६९।।**
**त्रिपुण्ड्रा भ्रूसमा रेख्या वर्णादिस्मृतिपूर्वकम् । त्र्यर्णास्त्रिदेवास्त्रिगुणास्त्रिरात्मानस्त्रिशक्तयः ।।७०।।**

'हे हर! हे अज! हे अनंत! हे शंभो! हे जगन्निदान! नः मुक्त्यै अल्पक+साधनं उपादिश। हे शिव! सर्वाणि प्रोक्तानि साधनानि तु दुष्कराणि।'६७। शिव उवाच। 'दर्शनात् अघं परिहृत्य, विधिवत् धृतेः भस्मनः शं भुक्त्वा पुरुषः अह्नाय अलं जीवन्मुक्तः भविष्यति।६८। यज्ञ+उत्थं वा करीष+उत्थं 'अग्निः' इत्यादि मंत्रितं, 'त्र्यायुषं' इत्येतैः अङ्गुलीभिः प्रतिस्थलं धार्यम्।६९। वर्णादि+स्मृति+पूर्वकं भ्रूसमा त्रिपुंड्रा रेख्या। त्रि+अर्णाः, त्रि+देवाः, त्रि+गुणाः, त्रिः+आत्मनः, त्रि+शक्तयः,।७०।

'हर, अनंत, अज, शंभो, हे जगत्कारण, आम्हांला या जन्म-मरणरूपी संसारापासून मुक्त होण्यासाठी एखादे छोटे आणि सोपे असे साधन सांगा. आतांपर्यंत आपण उपदेशिलेली सर्व साधने खरोखर दुष्कर आहेत.६७.

**भस्ममाहात्म्य -** भगवान शंकर म्हणाले, 'भस्माच्या केवळ दर्शनाने पापांचा परिहार करून, ते विधिपूर्वक धारण केल्याने सुख भोगून पुरुषाला शीघ्रच जीवन्मुक्त करते. अधिक काय सांगावे?'६८. यज्ञापासून झालेले किंवा जाबालांनी सांगितलेल्या पद्धतीने वाळलेल्या शेण्या जाळून केलेले भस्म उत्तम होय. ते 'अग्निरिति भस्म..' इत्यादि मंत्राने अभिमंत्रावे आणि 'त्र्यायुषं' इत्यादि मंत्रांनी तीन बोटांनी कपाळादि ठिकाणांवर लावावे.६९. भिवईच्या रुंदीच्या तीन रेघा वर्णादींचे स्मरण करून ठिकठिकाणी लावाव्या. 'अ', 'उ', 'म' हे तीन वर्ण (अक्षरे), ब्रह्मा-विष्णू-महेश्वर ह्या तीन देवता, सत्त्व-रज-तम हे तीन गुण, विश्व-तैजस-प्राज्ञ हे तीन अभिमानी (आत्मे), इच्छा-द्रव्य-क्रिया,७०.

**त्रिछन्दसस्त्रिलोकास्त्रि-वेदास्त्रिषवणाः स्मृताः । सर्वाघहृत्सदा सर्वैर्धार्यं तद्विधिवन्नरैः ।।७१।।**
**भक्त्याज्ञेनापि तद्धार्यं तारकं नापरं ह्यतः । परस्त्रीगोनिन्दकोऽसन् क्षेत्रहृत्परपीडकः ।।७२।।**
**गृहदाही मृषावादी खलो वेदरसक्रयी । नीचाच्च दुष्प्रतिग्राही वृषलीविधवादिगः ।।७३।।**

त्रि+छंदसः, त्रिलोकाः, त्रि+वेदाः, त्रि+षवणाः स्मृताः। तत् सर्व+अघ+हृत् सर्वैः नरैः सदा विधिवत् धार्यम्।७१। अज्ञेन अपि तत् भक्त्या धार्यम्। अतः न अपरं तारकं (अस्ति) हि। (पर+स्त्री+गः, निन्दकः, क्षेत्र+हृत्ट पर+पीडकः।७२। (परस्त्रीगः, निन्दकः, असन्, क्षेत्रहृत्, परपीडकः), गृहदाही, मृषावादी, खलः, वेद+रस+क्रयी, नीचात् दुः+प्रतिग्राही, वृषली+विधवा+आदि+गः,।७३।

ह्या तीन शक्ती, गायत्री-उष्णिक्-अनुष्टुभ हे तीन छंद, भूः-भुवः-स्वः हे तीन लोक, ऋग्वेद-यजुर्वेद-सामवेद हे तीन वेद आणि प्रातः-माध्याह्न-सायं हे तीन सवन आहेत. सर्व पापहर अशा भस्माचे सर्व वर्णाच्या तसेच सर्व आश्रमाच्या स्त्रीपुरुषांनी आणि विधवादींनीही - मनुष्यमात्रांनी, विधिपूर्वक धारण करावे.७१. अगदी अज्ञानी माणसानेही ते भक्तीपूर्वक लावावे; कारण ह्याच्याइतके तारक दुसरे साधनच नाही.७२.

**जाणून करणाऱ्याला अधिक फळ -** इतके आवर्जून सांगितल्यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो की केवळ भस्म लावण्याचेच एवढे पुण्य असेल तर मग ज्ञानाचे काय प्रयोजन! हिरडा खाल्ल्याने त्याचे ज्ञान असले वा नसले तरी विरेचन होतेच. त्याचे असे समाधान आहे की ज्याला ज्ञान असते त्याला अधिक लाभ होतो. पद्मरागादि मण्यांचा विक्रय करतांना भिल्लाला वगैरे जेवढे पैसे मिळतात त्याहून मण्यांचे ज्ञान असलेल्या सराफाला अधिक लाभ होतो हे आपण पाहतोच ना? छांदोग्यांत (१:१:१०) सांगितले आहे की ज्ञानपूर्वक, श्रद्धेने आणि ध्यानयोगाने केलेले कर्मच अधिक वीर्यशाली होते. जाणून कर्म करावे अशी श्रुतीही आहे. यासाठी जाणून - समजून केलेल्या कर्माचे फल उत्कृष्ट होते. हा नियम सर्वच कर्मांना लागूं आहे.

'परस्त्रीगामी, निन्दक, अधर्माचारी,जमीन लुबाडणारा, घराला आग लावणारा, खोटा आरोप करणारा, दुष्ट, वेद आणि रस (विष, मद्य आदि) यांचा विक्रय करणारा, हीनाकडून निषिद्ध दान घेणारा, कुमारिका किंवा विधवा स्त्रियांशी संग करणारा,७३.

**ज्ञानाज्ञानकृताऽघोपि मुक्तः स्याद्भस्मधारणात् । भस्मत्रिपुण्ड्ररुद्राक्षैः स्वः पूज्यो ना पुमर्थदैः ।।७४।।**
**सहस्रप्राक्परोत्पत्ति-दोषघ्नं व्याधिनाशनम् । तीर्थाप्लुतिजपाधिक्य-फलदं भस्मधारकम् ।।७५।।**
**स्वरादिलोकं नीत्वान्ते शैवे स्थापयति ध्रुवम् । सनत्कुमार सुलभं तारकं भस्मधारणम् ।।७६।।**
**एवं सनत्कुमारेश-संवादस्ते मयोदितः । तस्मात्त्वं परिधत्स्वाङ्गे भस्मेत्युक्त्वा ददौ मुनिः ।।७७।।**
**राक्षसोऽपि तदादाय भस्माङ्गे विधिवद्दधौ । तदैव राक्षसीं हित्वा तनुं मुक्तोऽभवत्क्षणात् ।।७८।।**

ज्ञान+अज्ञान+कृत+अघः अपि भस्मधारणात् मुक्तः स्यात्। पुं+अर्थदैः भस्म+त्रिपुण्ड्र+रुद्राक्षैः ना स्वः पूज्यः।७४। भस्म+धारकं सहस्र+प्राक्+पर+उत्पत्ति+दोष+घ्नं, व्याधि+नाशनं, तीर्थ+आप्लुति+जप+आधिक्य+फलदम्।७५। स्वः+आदि+लोके नीत्वा अन्ते शैवे ध्रुवं स्थापयति। (हे) सनत्कुमार भस्मधारणं सुलभं तारकं (च)।७६। एवं सनत्कुमार-ईश+संवादः ते मया उदितः। तस्मात् त्वं भस्म अङ्गे परिधत्।' इति उक्त्वा मुनिः (भस्म) ददौ।७७। 'राक्षसः अपि तत् भस्म आदाय विधिवत् अङ्गे दधौ। तदा एव (सः) राक्षसीं तनुं हित्वा क्षणात् मुक्तः अभवत्।७८।

जाणून किंवा अजाणतां पाप करणारे अंगाला भस्म लावल्याने त्या पापापासून मुक्त होतात. मानवाला पुरुषार्थांची (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) प्राप्ती करून देणाऱ्या भस्माचे त्रिपुंड्र तसेच रुद्राक्ष धारण करणारे मानव स्वर्गांतही पूज्य होतात.७४. भस्म धारण करणाऱ्याच्या पूर्वापर हजार जन्मांचे दोष नष्ट करून, तसेच त्याच्या व्याधींचाही नाश करून, तीर्थस्नान, जप इत्यादिकांपेक्षाही अधिक फळ भस्म देते.७५. स्वर्गादि लोकांत नेऊन शेवटी निरतिशयानंदरूप शैवलोकांत शाश्वत पुनरावृत्तीरहित ठेवून देणारे हे भस्मधारण तारक तर आहेच, पण तुला हवे तसे सुलभही आहे.७६. हे राक्षसा, असा हा सनत्कुमार आणि महादेव यांचा संवाद मी तुला सांगितला. तरी तूं हे भस्म स्वतःच्या शरीराला लावून घे.' असे म्हणून वामदेव मुनींनी त्याला आपल्याजवळचे भस्म दिले.७७. तेव्हां ब्रह्मराक्षसानेही ते भस्म घेऊन मंत्रासह अंगावर धारण केले. त्याच वेळी त्याने त्या राक्षस देहाचा त्याग केला आणि तत्क्षणी तो मुक्त झाला.७८.

**तदैवाप्तं विमानं स तेनागात्तत्क्षणाद्दिवम् ।**
**तस्मान्मुने भस्मशक्तिं ज्ञात्वाङ्गे धेहि मुच्यसे ।।७९।।**
**एवं गुरूक्तं ह्यभिगृह्य हृष्टो भक्त्योपसंगृह्य तमाज्ञयागात् ।**
**त्रिविक्रमोऽन्येऽपि हि तत्प्रमाणं मत्वोत्तमं चेरुरथो तथैव ।।८०।।**
**एवं क्रियाविपाकोऽयमीदृक्श्रुतिभयङ्करा ।**
**दण्डधृग्यातना तस्माच्छ्रेय एव सदाचरेत् ।।८१।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मविपाको नाम पञ्चदशोऽध्यायः ।।१५।।**

तदा एव विमानं आप्तम्। तेन सः तत् क्षणात् दिवं अगात्। तस्मात्, हे मुने, भस्म+शक्तिं ज्ञात्वा अङ्गे धेहि। मुच्यसे।'७९। एवं गुरु+उक्तं अभिगृह्य हृष्टः त्रिविक्रमः तं उपसंगृह्य आज्ञया अगात्। अन्ये अपि हि अथः तत् प्रमाणं उत्तमं मत्वा तथा एव चेरुः।८०। एवं क्रिया+विपाकः दण्ड+धृक्+यातना ईदृक् श्रुति+भयंकरा। तस्मात् श्रेय एव सदा आचरेत्।८१।

तात्काळ त्याच्यासाठी विमान आले आणि त्यात बसून तो सगेच स्वर्गाला गेला. ही कथा सांगून श्रीगुरू त्रिविक्रमांना म्हणाले, 'हे मुनिराज, हे भस्माचे सामर्थ्य जाणून ते नित्य शरीरावर धारण करा, म्हणजे मुक्त व्हाल!'७९. हा श्रीगुरूंचा उपदेश श्रवण करून संतोष पावलेल्या त्रिविक्रम स्वामींनी भक्तिपूर्वक त्यांना वंदन केले आणि त्यांची आज्ञा घेऊन कुमसीला गेले. तिथे जमलेले इतरही सद्गुरूंचा हा उपदेश श्रेष्ठतम प्रमाण मानून त्याप्रमाणेच आचार करू लागले.८०. असे हे कर्मविपाक आणि यमयातना ऐकायलासुद्धा भयंकर आहेत. मग भोगायला किती भयानक असतील? छांदोग्योपनिषदांत (५:१०:७) ह्याचे स्पष्ट दिग्दर्शन आहे. जे इथे भूलोकांत गलिच्छ आचरण करतात ते श्वान-सूकर-चांडालादि गलिच्छ योनींत जन्म घेतात. जे इथे चांगले आचरण करतात त्यांना तशाच चांगल्या योनीत (ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य) जन्म मिळतो. तरी श्रेयाचे म्हणजे सत्कर्माचेच आचरण मनुष्याने करावे. गरुडपुराणाच्या

प्रतिपादनानुसार (प्रेतकल्प, धर्मकांड ११:१२) स्वर्ग आणि मोक्ष या दोन्हींचे साधन असणारा हा मनुष्यजन्म लाभूनही जे त्यातले एकही साधत नाहीत ते स्वतः घोर वंचना करतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला दुसरा आणि प्रथमपासून पंधरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। षोडशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**नमस्ते ब्रूहि चरितं हरेरद्भुतकर्मणः । शृण्वतोऽपि न मे तृप्तिरमृतं पिबतो यथा ।।१।।**

नामधारक उवाच। (भो सिद्ध) ते नमः। अद्भुत+कर्मणा हरेः चरितं ब्रूहि। शृण्वतः अपि मे न तृप्तिः यथा अमृतं पिबतः।१।

श्रीगणेशाय नमः। *सोळाव्या अध्यायीं सतीला श्रीगुरु स्त्रियांचे धर्म उपदेशिती। सर्वेंचि करुणाघन तियेच्या मृत पतीला जिवंत करिती।।१।।*

**श्रेय आणि प्रेय** - मागील अध्यायाच्या शेवटी सदा श्रेयाचीच कास धरावी असे म्हटले आहे. हे श्रेय म्हणजे काय ते कठोपनिषदांत (१:२:१ -१:२:४) यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाच्या आरंभीच स्पष्ट केले आहे. श्रेय म्हणजे कल्याणाचा मार्ग. याउलट प्रेय म्हणजे ऐंद्रिय सुखाची वाट. विचारी माणूस प्रेयाच्या मागे न लागतो श्रेयाचा अंगीकार करतो. यांचे परिणाम परस्परविरोधी आहेत. श्रेयाची वाट चित्तशुद्धीद्वारा ज्ञानाकडे आणि अंतिम कल्याणाकडे जाते. ह्याला यमाने विद्या असे नाव दिले आहे. तर अविद्या अज्ञानांत रुतवणाऱ्या प्रेयाकडे नेते. ऐहिक आणि पारलौकिक विषयभोगांचे साधनभूत कर्म म्हणजे अविद्या; तर निरतिशय आनंदाचा लाभ करून देणारी विद्या म्हणजे ज्ञान. ह्या ज्ञानाचे स्वरूप आपण ज्ञानकांडात पाहिले आहे. मात्र हे ज्ञान विषयवासनांनी कलुषित चित्तांत सहसा स्फुरत नाही. त्या चित्ताच्या शुद्धीसाठी शास्त्रविहित नित्य आणि नैमित्तिक कर्म निष्काम बुद्धीने करणे आवश्यक आहे. त्या कर्माचे निरूपण पुढे तीन अध्यायांत केले आहे. त्यापूर्वी दोन अध्यायांत स्त्रियांचे धर्म निरूपिले आहेत.

नामधारकांनी सिद्धमुनींना नमस्कार करून विनंति केली की, 'अद्भुत चमत्कारांनी भरलेले श्रीगुरूंचे चरित्र आपण मला पुढे सांगा. ते कितीही ऐकले तरी माझे मन तृप्त होत नाही. जसे अमृत पिणाऱ्याला ते अधिकाधिक हवेच असते तसे!'१.

**।। सिद्ध उवाच ।।**

**सत्पृष्टं वत्स धन्योऽसि भवाब्धिर्लीलया जितः । चित्तं ते चरितैर्विद्धं हरेस्तेनास्मि तोषितः ।।२।।**
**को ब्रूयाद्भगवल्लीलां कति चित्राणि वच्मि ते । मूको ब्रूते प्रेक्षतेऽन्धो मृतो जीवति यद्दृशा ।।३।।**
**शृण्वेको माहुरे विप्रो गोपीनाथो धनी मृताः । तत्पुत्रा बहवोऽथैको जीवितो दत्तसेवया ।।४।।**
**दत्तप्रसादाच्चिरजीवितं सुतं नाम्नाकरोद्दत्तमिति द्विजातिजः ।**
**कान्तः सुलक्ष्मा मतिमान्सुसात्त्विकः पित्रोर्मृतार्भाकविनाश्यवर्धत ।।५।।**

सिद्ध उवाच। '(हे) वत्स, सत् पृष्टम्। धन्यः असि। भव+अब्धिः लीलया जितः। ते चित्तं हरेः चरितैः विद्धं तेन तोषितः अस्मि।२। भगवत्+लीलां कः ब्रूयात्? कति चित्राणि ते वच्मि। यत् दृशा मूकः ब्रूते, अन्धः प्रेक्षते, मृतः जीवति।३। शृणु। माहुरे एको धनी विप्रः गोपीनाथः। बहवः तत्+पुत्राः मृताः। अथ एकः दत्त+सेवया जीवितः।'४। दत्त+प्रसादात् चिर+जीवितं सुतं द्विजातिजः नाम्ना दत्त इति अकरोत्। कान्तः सुलक्ष्मः मति+मान् सुसात्त्विकः पित्रोः मृत+अर्भ+अक+विनाशी अवर्धत।५।

सिद्ध म्हणाले, 'वा! उत्तम प्रश्न विचारलास. यमाने जसे सोन्याची साखळी असलेल्या प्रेयाला सोडून श्रेयाची कांस धरल्याबद्दल नचिकेत्याचे अभिनंदन केले तसेच तुझे करायला हवे. तू खरेच धन्य आहेस! श्रवणभक्तीचा आदर करून तू हा दुस्तर जन्ममरणरूपी संसार लीलया जिंकला आहेस. श्रीगुरूंच्या चरित्राने तुझ्या मनाचा वेध घेतला आहे हे पाहून मला खूप आनंद वाटतो.२. भगवंताच्या लीला पूर्णतया कोण बरे सांगू शकेल? कुणीच नाही. कांही आश्चर्यकारक घटना मी तुला सांगतो. त्या श्रीगुरूंच्या केवळ कृपादृष्टीनेच मुका बोलू लागतो, आंधळा पाहू लागतो, एवढेच काय मेलेलासुद्धा जिवंत होतो.'३. तर ऐक. माहूर गांवी एक गोपीनाथ नावाचा धनाढ्य ब्राह्मण होता. त्याचे बरेच पुत्र लहानपणीच मरण पावले. मग श्रीदत्तप्रभूंच्या उपासनेने त्याचा एक मुलगा जगला.४. दत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने जगलेल्या त्या मुलाचे नाव ब्राह्मणानी 'दत्त' असेच ठेवले. तो सुंदर, तेजस्वी, सुलक्षणी, बुद्धिमान मुलगा मातापितरांचे आधीच्या मुलांच्या मृत्यूचे दुःख हलके करीत त्याच्या घरी वाढू लागला.५.

**सुसंस्कृतस्यास्य विधेः सुरूपिणी लब्धा वधूर्धीगुणशीलशालिनी ।**
**रतिः स्मरस्येव परस्परोत्थितमासीत्तयोः प्रेम रथाङ्गनामवत् ।।६।।**
**सरूपौ सुरूपौ स्वयोर्मन्यमानौ वियोगं कुयोगं क्षणं धर्मदक्षौ ।**
**उभौ तौ स्मरन्तौ सदाऽन्योऽन्यभद्रं न तन्द्रा न निद्रा पतिप्रेम्णि साध्व्याः ।।७।।**

अस्य सुसंस्कृतस्य विधेः सुरूपिणी धी+गुण+शालिनी वधूः लब्धा। तयोः रति+स्मरस्य इव परस्पर+उत्थितं प्रेम रथांगनामवत् आसीत्।६। तौ उभौ सरूपौ सुरूपौ स्वयोः वियोगं कुयोगं मन्यमानौ, धर्मदक्षौ, सदा अन्यः+अन्य+भद्रं स्मरन्तौ। साध्व्याः पति+प्रेम्णि न तन्द्रा न निद्रा (आसीत्)।७।

यथाकाल त्याचे मौंजीबंधनादि संस्कार झाले. त्याच्या सुदैवाने त्या सुंदर, बुद्धिमती आणि गुणवान् अशी पत्नीही लाभली. त्या दंपतीमध्ये रती आणि मदन यांच्यासारखे प्रेम निर्माण झाले आणि ते चक्रवाक पक्ष्यांच्या प्रेमाप्रमाणे दृढावले.६. ते दोघे पतिपत्नी सुंदर आणि परस्परांना अनुरूप असे होते. एकमेकांचा किंचितही वियोग त्यांना सहन होत नसे. धर्माचरणांत ते उभयतां दक्ष होते आणि एकमेकांचे हित जिह्वाळ्याने जपत होते. त्या साध्वीला तर पतीच्या प्रेमापुढे न झोप, ना थकवा येत असे. इथे **सरूपौ** शब्दाचा अर्थ सारख्या रूपाचे असा घेतला तर याज्ञवल्क्यस्मृतीतल्या विवाहप्रकरणांतील(५२) 'वधू वयाने आणि अंगाने वरापेक्षा लहान (*यवीयसी*) असावी' या वचनाचा विरोध होतो. म्हणून सरूपौचा अर्थ अनुरूप असाच होतो.७.

**लेपोऽत्युष्ण इवानिलोऽनलसमः शीतांशुरुष्णांशुवच्छय्या वृश्चिकवत्सुमस्रगहिवद्भूषाः समाः कण्टकैः ।**
**वाङ्माधुर्यमपि प्रदीपनसदृक्स्वाद्वन्नमप्युत्कटु प्रेष्ठे त्वन्तरिते क्षणं दृढतरां साध्व्या अभूत्सर्वदा ॥८॥**
**एवं सतोश्चापरिहार्यशोषवान् भर्ता सुसाम्यासहनाद्विधेरभूत् ।**
**क्षीणोऽरुचिः श्वासकफार्दितोऽनिशं दुःखोज्झितस्वापभुजिः सुमन्दवाक् ॥९॥**

प्रेष्ठे क्षणं अन्तरिते तु साध्व्या लेपः अति+उष्णः, अनिलः अनलसमः, शीत+अंशु उष्ण+अंशुवत्, शय्या वृश्चिकवत्, भूषाः कण्टकैः समाः, वाक्+माधुर्यं अपि प्रदीपनसदृक्, स्वादु+अन्नं अपि उत्कटु सर्वदा अभूत्। ८। एवं सतोः विधेः सुसाम्य+असहनात् भर्ता अपरिहार्य+शोषवान् अभूत्। क्षीणः अरुचिः अनिशं श्वास+कफ+अर्दितः दुःख+उज्झित+स्वाप+भुजिः, सुमन्द+वाक् (अभूत्)।९।

पतीच्या क्षणभरही विरहाने त्या साध्वीला गार लेपसुद्धा पोळत असे; शीतल वायूसुद्धा अग्निसारखा दाहक वाटे; चंद्राच्या चांदण्याचेही चटके बसत; मृदू शय्याही विंचवासारखी दंश करीत असे; अलंकार काट्यासारखे टोचत असत; मधुर भाषणसुद्धा तिच्या चित्ताचा क्षोभ करी; एवढेच काय, चविष्ट अन्नही अति तिखट लागे.८. असा त्या दंपतीचा सुखाचा संसार जणू दैवाला पाहवला नाही. पतीला असाध्य असा क्षय रोग झाला. तो अत्यंत क्षीण झाला, सतत श्वास आणि दमा यांनी बेजार झाला. या दुःखामुळे त्याची झोप आणि आहार अत्यंत कमी झाले.९.

**भुङ्क्ते यथान्नं स सती तथान्नं शेतेऽपि यावत्स सती तु तावत् ।**
**कृशोऽपि यद्वत्स सती तु तद्वत् छायापरेवास्य पतिव्रताऽभूत् ।।१०।।**
**वैद्योऽन्तिके तस्य कुगन्धशङ्कया न याति साध्वी सुमना न तं जहौ ।**
**भेजे पतिं स्नानसुगन्धिलेपनैः पादाङ्गसंवाहनभेषजार्पणैः ।।११।।**

सः यथा अन्नं भुङ्क्ते, तथा सती अन्नं (भुङ्क्ते)। (सः) यावत् शेते सती तु तावत् (शेते)। यद्वत् सः कृशः सती तु तद्वत् (कृशा)। पतिव्रता अस्य अपरा छाया अभूत्।१०। वैद्यः कुगंध+शंकया तस्य अंतिके न याति। सुमना साध्वी तं न जहौ। पतिं स्नान+सुगंधि+लेपनैः पाद+अङ्ग+संवाहन+भेषज+अर्पणैः भेजे।११।

**क्षयाची लक्षणे -** इथे श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत चरकसंहितेतील (निदानस्थान ६:१५-१७) क्षयाच्या अकरा लक्षणांचा निर्देश केला आहे. डोके जड पडणे, दम लागणे, खोकला, स्वर कांपरा होणे, कफ पडणे, रक्त पडणे, कुशीच्या बरगड्या, खांदे व फऱ्याचे हाड यांच्या वेदना, ज्वर, अतिसार आणि अन्न गोड न लागणे. अशक्त, क्षीण, रक्त आणि स्नायू कमी झालेला रोगी. क्षयाची लक्षणे सौम्य असली किंवा धोकाजनक नसली तरी तो अरिष्टकारीच मानावा. औषधोपचाराचा विशेष प्रभाव पडणार नाही असे तिथेच सांगितले आहे. यासाठी अपरिहार्य क्षय असे म्हटले आहे.

अशा स्थितीत त्या पतिव्रतेने केलेल्या पतीचे मार्मिक वर्णन श्रीस्वामिमहाराजांनी केले आहे. तो जेवढे अन्न घेत असे तेवढेच ती सती घेई. त्याला जितका वेळ झोप येई तितकाच वेळ तीही झोपत असे. तो जितका रोड झाला तितकीच ती सतीही रोडावली. एकूण काय तर ती साध्वी त्याची जणू दुसरी सावलीच होऊन गेली!१०. त्याच्या शरीराच्या दुर्गंधीमुळे वैद्यही त्याच्याजवळ जाण्याचे टाळू लागले. पण त्या थोर मनाच्या सतीने त्याला सोडले नाही. त्याला स्नान घालून त्याच्या शरीरावर सुगंधी लेप लावू लागली. त्याचे पाय, अंग चुरून देऊ लागली. त्याला वेळच्या वेळी औषध देत असे.११.

**शान्त्यार्चनैर्होमजपैश्च भेषजैर्दानैर्न यक्ष्मा किमपि व्यहीयत ।**
**श्यामामुखेन्दुं परिपूर्णमुद्ग्रसन्मन्दस्मितज्योत्स्नमभूत्परो ग्रहः ।।१२।।**

अर्चनैः, होम+जपैः, भेषजैः, दानैः, शान्त्या च यक्ष्मा किं अपि न व्यहीयत्। मन्द+स्मित+ज्योत्स्नं श्यामा+मुख+इन्दुं परिपूर्णं उद्ग्रसन् (यक्ष्मा) परः ग्रहः अभूत्।१२।

*'पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण बाधते। तच्छान्तिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः'* या मनुस्मृतीच्या वचनानुसार पूर्वजन्मी केलेल्या पापापासून उद्भवलेल्या या क्षयरोगाच्या उपशमासाठी देवपूजा, होम, जप, औषधी आणि दान हे उपाय करण्यात आले. पण तो रोग मुळीच हटला नाही. त्याने त्या श्यामेच्या मुखरूपी पूर्णचंद्राची ज्योत्स्नाच असलेले तिचे मंदस्मित राहूप्रमाणे पूर्णतः ग्रासून टाकले. पतीला झालेल्या क्षयरोगाने तिचे मुख म्लान झाले हे उपमालंकाराने सांगितले आहे. **श्यामा** या शब्दाचे दोन अर्थ टीकेत दिले आहे. सोळा वर्षांची बाला आणि उष्णकालांत शीत असणारी आणि शीतकालांत उष्ण असणारी युवती.१२.

इथे अशी एक शंका उपस्थित केली आहे की बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार **क्रियमाण कर्माचे फल** जन्मांतराने मिळते. तेव्हा व्याधीच्या उपशमासाठी केलेल्या देवपूजादि कर्मांचा सध्याच्या जन्मात कसा उपयोग होईल? त्याचे समाधान असे आहे की अत्यंत तीव्र पापाचे किंवा पुण्याचेही फळ ह्याच जन्मात भोगावे लागते. त्यानुसार ह्या जन्मात केलेल्या जपहोमादि कर्मांनी पूर्वजन्माच्या कर्माचा उपशम होऊन आरोग्याचा लाभ होऊ शकतो.

**द्विजं रुजार्तं च तथाविधां वधूं तयोर्न शेकुः पितरौ निरीक्षितुम् ।**
**निवारिता तैरपि सा पतिव्रता न तं जहावर्यमणं प्रभा यथा ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्राग्वैरतः कष्टमिदं मयार्पितं धृत्या पितः सात्त्विकयाम्ब जीवितुम् ।**
**साध्वर्हथस्ते सति पूर्ववैर्यहं तन्मां विहायाशु पितुर्गृहं व्रज ।।१४।।**

रुजा+आर्तं द्विजं च तथाविधां वधूं तयोः पितरौ निरीक्षितुं न शेकुः। तैः निवारिता अपि सा पतिव्रता, यथा अर्यमणं प्रभा, तं न जहौ।१३। विप्र उवाच। '(हे) पिता, (हे) अम्ब, मया प्राक्+वैरतः इदं कष्टं अर्पितम्। साधु सात्त्विकया धृत्या जीवितुम्। (हे) सति अहं ते पूर्ववैरी। तत् मां विहाय आशु व्रज।'१४।

रोगाने कष्टलेला तो मुलगा आणि त्याच्या सेवेने तेवढीच कष्टणारी त्याची पत्नी ह्यांच्याकडे पाहणेसुद्धा आईवडिलांना दुःसह झाले. त्यांनी आपल्या सुनेला इतके कष्ट करू नकोस असे सांगूनही पाहिले. पण त्या पतिव्रतेने, सूर्याला जशी त्याची प्रभा, तसे आपल्याला पतीपासून क्षणभरही दूर होण्यास नकार दिला.१३. त्या सर्वांचे क्लेश पाहून तो पुत्र आईवडिलांना म्हणाला, 'मी तुम्हांला हे दुःख देत आहे ते पूर्वजन्मीच्या कांही वैराचा सूडच असावे. तुम्ही आतां उत्तम सात्त्विक धैर्याने ते सहन करून जीवन कंठायचे आहे. मग तो आपल्या पत्नीला म्हणाला, मी तुझा पूर्वजन्मीचा दावेदार आहे. मला दुर्भाग्याला सोडून तू लवकर माहेरी जा.'१४.

**।। साध्व्युवाच ।।**

**नार्हास्म्यनन्यशरणा परिहापितुं ते नन्वर्धसुन्दरशरीरविभागिनीयं ।**
**जीवोऽस्य साधुवपुषोऽस्ति भवान्वियुक्ते जीवे तनोर्ननु भवेत्खलु जीवहत्या ।।१५।।**
**सदा मदास्यं शशिशालि कालिमा कुतो यतो भैधत एवमेव ते ।**
**अकी सुखी यत्र भवत्यवत्यघात् तमीशमीडे स तु देवदेवतः ।।१६।।**
**नमो नमो वां श्वशुरौ मया श्रुतो गुरुः स गन्धर्वपुरेऽस्ति तारकः ।**
**असुप्रियोऽनामयमेति भाति मे सहामुना यास्य उ रोचतेऽपि वाम् ।।१७।।**

साध्वी उवाच। 'ते अनन्यशरणा परिहापितुं न अर्हा। ननु इयं अर्ध+सुंदर+शरीर+विभागिनी। भवान् अस्य साधु+वपुषः जीवः अस्ति। तनोः जीवे वियुक्ते खलु जीवहत्या भवेत्।'१५। सदा मत्+आस्यं शशि+शालि। कालिमा कुतो? यतो ते भा एधत एव। यत्र अकी सुखी भवति सः अघात् अवति। तं ईशं ईडि। स तु देवदेवतः।१६। (हे) श्वशुरौ, वां नमो नमः। मया श्रुतः गन्धर्वपुरे गुरुः अस्ति, सः तारकः। मे भाति असु+प्रियः अनामयं एति। अमुना सह यास्ये, वां रोचते अपि?'१७।

ती सती म्हणाली 'केवळ आपलाच एक आधार असलेल्या ह्या अगतिक स्त्रीचा त्याग उचित नाही. मी आपल्या या सुंदर शरीराची अर्धांगिनी आहे. आपण ह्या माझ्या शरीराचे प्राणच आहांत. देहापासून जीव वेगळा झाला तर ती जीवहत्याच होईल ना?' तिचे हे प्रतिपादन तैत्तिरीय संहितेच्या (६:१:८५) '*अर्धो वा एष आत्मा पत्नीशरीरम्।*' या वचनाशी सुसंगतच आहे.१५. माझे मुख सदैव तेजस्वीच आहे. आपली कांती जोवर वाढती आहे तोवर त्याला कुठलाही डाग लागणार नाही. दुःखी जीवाला सुखी करणारा आणि पापापासून रक्षण करणाऱ्या देवाची आपण स्तुती करू या. तोच सर्व देवांचाही देव आहे.१६. अहो मामंजी, मामी, तुम्हांला वारंवार नमन असो. मी असे ऐकले आहे की गाणगापूर येथे श्रीगुरू (नृसिंहसरस्वती) आहेत. तोच तारणहार आहे. आपल्याला जर रुचत असेल तर मी ह्यांना त्यांच्याकडे घेऊन जाते.१७.

**तावूचतुः क्वापि तव श्रमेण सम्राज्ञि जीवेत स तत्र गच्छ ।**
**श्रुत्वैवमाराच्छ्वशुरौ प्रणम्य तदाज्ञयाऽगात्सह तेन साध्वी ॥१८॥**
**सुखस्थितं मन्थरवाहवाहितं तमन्वगच्छत्पतिमङ्घ्रिचारिणी ।**
**दधौ कराकृष्टधवा गमानत-क्षमेभिभामुत्कुचगण्डकर्शिता ॥१९॥**
**क्रान्तेऽयनेथो कतिचिच्छनैः शनैर्मृत्युं धवोऽगात्स तदैव दैवतः ।**
**सा मर्तुमुत्कापि निवारितेतरैः शुक्तामसीम्लानमुखाम्बुजाऽवदत् ॥२०॥**

तौ ऊचतुः। (हे) सम्राज्ञि, तव श्रमेण सः (यत्र) क्वापि गच्छति तत्र गच्छ। एवं श्रुत्वा श्वशुरौ प्रणम्य तत्+आज्ञया तेन सह साध्वी अगात्।१८। सुख+स्थितं मन्थर+वाह+वाहितं तं पतिं अङ्घ्रि+चारिणी अनु+अगच्छत्। कर+आकृष्ट+धवा गम+आनत+क्षमा इभा+भां उत्कुच+गण्ड+कर्शिता दधौ।१९। कतिचित् शनैः शनैः अयने क्रान्ते तदा एव दैव+तः धवः मृत्युं अगात्। सा मर्तुं उत्का अपि इतरैः निवारिता। शुक्+तामसी+म्लान+मुख+अम्बुजा अवदत्।२०।

सासू-सासरे म्हणाले, 'वेदोक्तीला अनुसरून तू सम्राज्ञीच आहेस (ऋग्वेद १०:८५:४६). जिथे कुठे तुझ्या प्रयत्नांनी हा बरा होईल तिथे जा! याप्रमाणे त्यांची आज्ञा घेऊन आणि त्यांना नमस्कार करून आपल्या पतीसह ती सावित्री गाणगापूरला निघाली.१८. हळूहळू चालणाऱ्या भोयांनी चालविलेल्या मेण्यात सुखाने पतीला बसवून ती पायीच त्याच्यामागे चालू लागली. पाठीमागून तिने आपल्या पतीला धक्के बसू नयेत म्हणून धरले होते. हत्तीच्या गंडस्थलांप्रमाणे कठीण आणि उन्नत वक्षांच्या भारानेच जणू ती वाकली होती. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावानेच की काय पण खालची जमीनही नम्र झाली होती. हत्तीच्या मागे जाणाऱ्या हत्तीणीसारखी ती गजगामिनी भासत होती.१९. कांही दिवस याप्रमाणे हळूहळू मार्ग क्रमून गाणगापूरच्या जवळ आल्यानंतरच दैवयोगाने तिचा पती मृत्यू पावला. तिने तेव्हांच आत्महत्येचा प्रयत्न केला; पण इतरांनी तिला परावृत्त केले. पतीच्या मृत्यूचे दुःख हीच जणू रात्र, तिच्यामुळे तिचे मुखकमल कोमेजून गेले.आणि ती शोकग्रस्त बाला बोलू लागली.२०.

**कालात्ययं मा कुरु कुर्वथाह्निकमुत्तिष्ठ शेषे कति नाथ विप्रराट् ।**
**कस्मान्न मे दास्यसि वल्लभोत्तरं प्रेष्ठं नु किं ते वचनं व्यलङ्घ्यम् ।।२१।।**
**प्राणाः क्व याताश्च मनः क्व ते गतं द्राक्तान्परावर्तय जीवितुं चिरम् ।**
**लिप्तः स्वमातापितृदारहत्यया भविष्यसि त्वं न तथा करोषि चेत् ।।२२।।**
**उद्वाहितां क्वैषि विहाय मां प्रियां पुत्राननुत्पाद्य कथन्वृणोद्धृतिः ।**
**स्थातव्यमीश क्व कथं न भाषितं कथं व्रजेयं सदनं गुरोश्च वः ।।२३।।**

'(हे) नाथ, विप्र+राट् काल+अत्ययं मा कुरु, आह्निकं कुरु। उत्तिष्ठ, कति शेषे? (हे) वल्लभ कस्मात् मे प्रेष्ठं उत्तरं न दास्यसि? किं नु ते वचनं व्यलंङ्घ्यम्? २१। ते मनः क्व गतं, प्राणाः क्व याताः? तान् द्राक् परावर्तय चिरं जीवितुम्। त्वं तथा न करोषि चेत् स्व+माता+पितृ+दार+हत्यया लिप्तः भविष्यसि।२२।'मां उद्वाहितां प्रियां विहाय क्व एषि? पुत्रान् अनुत्पाद्य कथं नु ऋण+उद्धृतिः? (हे) ईश, क्व कथं स्थातव्यं न भाषितम्। वः गुरोः सदनं च कथं व्रजेयम्?२३।

'अहो नाथा, ब्राह्मणश्रेष्ठा, तुमची संध्येची वेळ कधीच टळत नाही, लवकर उठून संध्या करा. किती झोप ही? वल्लभा, प्रियतमा माझ्याशी तुम्ही का बरे बोलत नाही? मी कांही तुमची अवज्ञा केली का?२१. मन ज्याचे चिंतन करते तेच वाचा बोलते. वाचेचा उपसंहार झाल्यावर केवळ मनाचे मननच उरते. मनाचाही लय झाल्यावर प्राणच राहतात. म्हणून ती साध्वी पतीला विचारते आहे, तुमचे मन, तुमचे प्राण कुठे गेले? जर ते परलोकांत गेले असतील तर लवकर त्याना परत आणा. तुम्हाला अजून पुष्कळ काळ जगायचे आहे. तुम्ही जर तसे केले नाही तर तुम्हांला आपल्या मातापित्यांच्या आणि पत्नीच्या हत्येचा दोष लागेल.' तुमच्यामागे आम्ही कुणीच जगू शकत नाही असा अभिप्राय.२२. 'मला, तुमच्या परिणीत पत्नीला सोडून कुठे जाता? आपल्याला पुत्रही झालेला नसता तुम्ही पितरांच्या ऋणातून कसे मुक्त व्हाल? तुमच्यामागे मी कुठे आणि कसे राहावे तेही जाण्यापूर्वी तुम्ही सांगितले नाहीत! तुमच्या मातापित्यांच्या घरी तरी मी कशी जाऊ?२३.

**सर्वत्र पूता त्वयि जीवतीशितर्-मदास्यमप्यद्य न कोऽपि पश्यति ।**
**सव्रीडनर्मोक्तिसुतल्पहावयुक्ताम्बूललेपादि कथं न ते हृदि ॥२४॥**
**सुखं स्वपोरूत्कुचभारभङ्गभीभीतमध्यात्मसुतल्प ईश ।**
**किं ते शिलाढ्ये शयनं कुपृष्ठे सुप्तः पृथङ्नर्तुमृतेऽद्य किं तत् ॥२५॥**
**नक्रोऽप्सु यद्वत्तृषितं यथा द्रुः श्रान्तं यथा गां तृणगां च हिंस्रः ।**
**प्रासाद ईशेक्षकमुन्निहन्ति जातं तथा मे गुरुदर्शनाप्तेः ॥२६॥**

त्वयि ईशितः जीवति सर्वत्र पूता। अद्य मत्+आस्यं अपि कः अपि न पश्यति। सव्रीड+नर्म+उक्ति सुतल्पं हावयुक् ताम्बूल लेपादि कथं ते हृदि न?२४। (हे) ईश, उरु+उत्+कुच+भार+भङ्ग+भी+भीतं अध्यात्म+सुतल्पं सुखं स्वप। ते शिला+आढ्ये कुपृष्ठे शयनं किम्? ऋतुं ऋते पृथक् न सुप्तः। अद्य किं तत्?२५। यथा तृषितं अप्सु नक्रः, श्रान्तं द्रुः, तृणगां गां च हिंस्रः, ईश+ईक्षकं प्रासादः उत् निहन्ति, तथा मे गुरु+दर्शन+आप्तेः जातम्।'२६।

तुम्ही, माझे स्वामी जिवंत असतांना मी सर्वत्र पवित्र गणली जात होते. आता माझे तोंडही कुणी पाहत नाही. ते लाजत केलेले विनोद, ती सुखशय्या, श्रांगारिक भावाने दिलेले विडे, सुगंधी उटण्याचे लेप हे सगळेच तुम्ही विसरून गेलां काय?२४. पुष्ट आणि उन्नत स्तनांनी मोडण्याच्या भयाने जणू घाबरलेल्या कटीचा हा माझा देह हीच उत्तम शय्या आहे. तिच्यावर आपण सुखाने पहुडा. हे असे दगडांच्या खडबडीत पृष्ठावर का झोपला? ऋतुकाल सोडला तर आपण कधीही माझ्यापासून वेगळे झोपला नाहीत. मग आताच का बरे दूर झोपलात?२५. तहानलेला नदीवर पाणी पिण्यास जावा आणि त्याला सुसरीने धरावे, थकलाभागला झाडाखाली बसावा आणि ते झाडच त्याच्यावर पडावे, भुकेली गाय गवताळ रानांत शिरावी आणि तिथे वाघाने तिच्यावर झडप घालावी, देवाच्या दर्शनाला देवळांत आलेल्यावर ते देऊळच अंगावर पडावे तसे आपल्या भेटीला आलेल्या माझ्यावर हा घोर प्रसंग ओढवला आहे.२६.

**जयेश्वरानन्त कथं त्वया कृतं भिया त्वयात्रापहृतोऽस्ति किं पतिः ।**
**रुक्शान्तिशक्तिर्यदि ते न गम्यतामिति त्वयोक्ते कतमोऽर्दितुं क्षमः ॥२७॥**
**त्वया कृतं साधु यशो दिवं ते वहामि भर्त्रा सह गौरिमातः ।**
**क्वेता ह्यवैधव्यकदानशक्तिर्व्रतेश्वरीशे न कथं स्मृतिर्मे ॥२८॥**
**माङ्गल्यतन्तुं च निशां च कुङ्कुमं हर्तुं महांश्चोर इहागतः कुतः ।**
**सौभाग्यनौर्मे भवसिन्धुसंस्थिता सा कालमीनेन कथं नु चर्विता ॥२९॥**

(हे) ईश्वर (हे) अनन्त, जय! त्वया कथं कृतम्? अत्र भिया पतिः अपहृतः अस्ति किम्? यदि ते रुक्+शान्ति+शक्तिः न, त्वया 'गम्यताम्' इति उक्ते कतमः अर्दितुं क्षमः?'२७। 'त्वया साधु कृतं, ते यशो भर्त्रा सह दिवं वहामि। (हे) मातः गौरि अवैधव्यक+दान+शक्तिः क्व इता? (हे) ईशे, व्रत+ईश्वरी मे स्मृतिः कथं न?२८। माङ्गल्यतन्तुं च निशां च कुंकुमं हर्तुं महान् चोरः इह कुतः आगतः? मे सौभाग्य+नौः भव+सिन्धु+संस्थिता सा काल+मीनेन कथं नु चर्विता?२९।

'परमेश्वरा, अनंता, आपण हे काय केलेत? माझ्या पतीला निरोगी करण्याच्या धाकाने त्याला माझ्यापासून हिरावले काय? जर तुमचे रोग बरा करण्याचे सामर्थ्य नसेल आणि तुम्ही मला घालवून दिले तर आपल्याला जाब विचारण्याची कुणाची टाप आहे?'२७. 'छान केलंस देवा! तुझी कीर्ती या पतीसह आता स्वर्गांत घेऊन जाते. आई, मंगळागौरी तुझे अवैधव्य देण्याचे सामर्थ्य कुठे गेले? हे व्रताच्या देवी, भगवती, '*विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे*' अशी तुझी प्रार्थना करणाऱ्या माझा तुला कसा विसर पडला?'२८. 'माझ्या मंगलसूत्रावर आणि हळदीकुंकवावर घाला घालणारा हा काळरूपी महान् चोर इथे श्रीगुरूंच्या सान्निध्यांत कुठून आला?' श्रीगुरूंच्या जवळ मृत्यूलासुद्धा प्रवेश नाही असा तिचा भाव व्यक्त होतो. 'संसारसागरांतली माझी सौभाग्यनौका काळरूपी मगरीने कशी हो गिळून टाकली?'२९.

**एवं रुदित्वोरुकुचत्रुटत्पटा संस्मृत्य संस्मृत्य तदीयचेष्टितम् ।**
**प्रत्यङ्गमालम्ब्य रुरोद मोहतः साध्वी तदा कश्चन साधुराययौ ।।३०।।**
**रुद्राक्षभूषो भसिताक्तदेहः शूली बभाषे जटिलः स साध्वीम् ।**
**बाले शुचा नैति मृतः कुतस्त्वं मुधोच्चकै रोदिषि तिष्ठ तूष्णीम् ।।३१।।**
**मृत्युर्न केषां विषयोऽपि देवान्ग्रसत्यसौ चापरिहार्य एव ।**
**द्रौ व्यैक्यमब्धौ च यथेन्धनैक्यं भवप्रवाहेऽपि तथा धवादिः ।।३२।।**

एवं रुदित्वा उरु+कुच+त्रुटत्+पटा साध्वी तदीय चेष्टितं संस्मृत्य संस्मृत्य, प्रत्यंगं आलम्ब्य, मोहतः रुरोद। तदा कश्चन साधुः आययौ।३०। रुद्राक्ष+भूषः भसित+आक्त+देहः शूली सः साध्वीं बभाषे। '(हे) बाले, मृतः शुचा न एति। त्वं मुधा उच्चकैः कुतः रोदिषि? तूष्णीं तिष्ठ।३१। मृत्युः केषां न विषयः? असौ देवान् अपि ग्रसन्ति। अपरिहार्य एव। यथा द्रौ वि+ऐक्यं, अब्धौ च इन्धन+ऐक्यं, तथा भव+प्रवाहे अपि धवादिः।३२।

असा विलाप करीत रडत भेकत, अंगावरची चोळी फाटलेल्या अवस्थेत पतीच्या आठवणी काढीत, त्याच्या अंगप्रत्यंगांना कवटाळीत बेभान होऊन ती साध्वी शोक करीत असताना तेथे कोणी एक साधू आला.३०. गळ्यात रुद्राक्षाच्या माळा, अंगावर भस्माचे पट्टे आणि हातात शूल धारण केलेला तो साधू तिला म्हणाला, 'कितीही रडलीस तरी मेलेला परत येणार आहे का? तसे असेल तर अवश्य रड! पण तसे होत नाही. व्यर्थ उच्चस्वराने रडू नकोस. शांत राहा.३१. तुझ्या पतीच्या मृत्यूच्या दुःखाने हा शोक तू करत असशील तर असे पाहा, मृत्यू कुणाला चुकला आहे? हा देवादिकांचाही ग्रास करतो. तो अटळच आहे. पतीच्या विरहामुळे तुला दुःख झाले असे म्हणशील तर झाडावर पक्षी एका रात्रीसाठी एकत्र येतात आणि सकाळ झाली की आपापल्या वाटेने निघून जातात. किंवा समुद्रामध्ये लाकडाचे ओंडके एकत्र येतात आणि पुन्हा परस्परांपासून दूर वाहून जातात. तसे पती, पत्नी, माता, पिता, बंधू, भगिनी इत्यादि संबन्ध हे तात्कालिकच असतात. संसारसागरांत कांही क्षण मात्र एकत्र येऊन पुन्हा आपापल्या प्रारब्धानुसार आपापल्या कर्मानुसार भ्रमण करीत असतात.'३२

**सम्बन्ध एषां नियतो मतश्चेत् प्राग्जन्मनि त्वं वद कस्य का वा ।**
**सम्बन्धिनः कस्य न केऽद्वयत्वाज्जीवश्चिदंशोऽखिलगोऽव्ययोऽजः ।।३३।।**
**पञ्चात्मकेऽस्मिन्खलु संगतेऽत्र भर्त्रादिबुद्धिर्न तु तत्त्वतोऽस्य ।**
**काष्ठाग्निवत्तं तु पुमादिलिङ्ग-हीनं धवादिं प्रकृतिस्थमाहुः ।।३४।।**

'एषां संबन्धः नियतः मतः चेत् त्वं प्राक् जन्मनि कस्य का वा? अद्वयत्वात् कस्य के अपि संबन्धिनः न। जीवः चित्+अंशः अखिलगः, अव्ययः, अजः।३३। अस्मिन् पञ्च+आत्मके संगते अत्र भर्त्रा+आदि+बुद्धिः अस्य न तु तत्त्वतः। काष्ठ+अग्नि+वत् प्रकृति+स्थं पुं+आदि+लिङ्ग+विहीनं धव आदिं आहुः।३४।

'पती, पुत्र इत्यादि संबन्ध जर तुला कायमचे वाटत असतील तर मग सांग बरं तू पूर्वजन्मी कुणा पुरुषाची कोण - पत्नी, माता, कन्या इत्यादि होतीस? वेदांताच्या सिद्धांतानुसार (छांदोग्य उपनिषत् ६:२:१) 'एकच एक ब्रह्म आहे त्याहून वेगळे कांहीच नाही; आणि ते तू आहेस.' अर्थातच त्याला संबंधी कसे व कुठले असणार? 'हा जीव माझाच अंश आहे', या भगवद्गीतेच्या (१५:१७) प्रतिपादनानुसार जीव हा चैतन्याचाच अंश आहे. भगवंतांनीच दुसऱ्या अध्यायांत (२०) म्हटल्याप्रमाणे हा न कधी जन्मतो न मरतो, हा कधी कुणाचा झाला नाही किंवा होणार नाही; हा जन्ममृत्यूरहित, नित्य, शाश्वत आणि पुरातन आहे; शरीराचा नाश केला तरी याचा नाश होत नाही.३३. पंचभूतांच्या या देहांत जीवाचा अनुप्रवेश झाल्यावर होणाऱ्या पती, पिता आदि भावना वेदांच्या कोणत्याही प्रमाणांना धरून नाहीत. लाकडाला आग लागली ती जशी त्याचाच आकार घेते तसा चैतन्याचा अंश असलेला जीव त्या त्या देहासारखा भासतो. कठोपनिषदांत (२:५:९) सांगितल्याप्रमाणे अग्नी ज्या ज्या पदार्थांत प्रवेशतो त्या त्या रूपाचाच होतो. त्याचप्रमाणे हा एकच अंतरात्मा विविध देहांमध्ये प्रवेश करून ती ती रूपे धारण करतो. खरे तर त्या चैतन्याला न रूप आहे न लिंग. तो न स्त्री आहे, न पुरुष, न नपुंसक. जे जे शरीर तो धारण करतो त्याचे गुणधर्म त्याच्यावर आरोपित होतात (श्वेताश्वतर उ. ५:१०). अशा त्या प्रकृतीत स्थिरावलेल्या आत्म्याला अज्ञानी लोक हा 'माझा पती, हा माझा पिता, हा माझा पुत्र' इत्यादि म्हणतात.३४.

**प्राप्तः प्रकृत्युत्थगुणानुगोऽसौ शरीरतादात्म्यमतोऽस्य वृद्धा ।**
**द्वन्द्वप्रतीतिर्न तु सामलेऽजे द्वन्द्वोत्थकर्माश्रयिणो भवोऽस्ति ।।३५।।**
**भवोद्भवः कर्मत एव कर्म भवोद्भवं तूभयमज्ञभावात् ।**
**धीरेण येनोभयमेव कृत्तं तत्त्वासिना तस्य न वै भ्रमोऽयम् ।।३६।।**

प्रकृति+उत्थ+गुण+ अनुगः असौ शरीर+तादात्म्यं प्राप्तः। अतो अस्य द्वन्द्व+प्रतीतिः वृद्धा। सा तु अमले अजे न। भवः द्वन्द्व+उत्थ+कर्म+आश्रयिणः अस्ति।३५। कर्मतः एव भव+उद्भवः, कर्म भव+उद्भवं, उभयं तु अज्ञभावात्। येन धीरेण उभयं एव तत्त्व+असिना कृत्तं तस्य अयं भ्रमः न वै।३६।

प्रकृतीतून उद्भवलेल्या गुणांना अनुसरल्याने हा जीव शरीराशी तादात्म्य पावतो. आपण हे शरीरच आहो अशा मोहांत पडतो. त्यामुळे आपण स्त्री आहो किंवा पुरुष आहो इत्यादि कल्पनांनी सुख-दुःखादि द्वंद्वाचा अनुभव घेतो. ही द्वंद्वप्रतीती शुद्ध, निर्विकार आत्मस्वरूपांत नसते. ह्या द्वंद्वाच्या प्रतीतीतून कर्मे घडतात आणि तीच ह्या जन्ममरणरूपी संसाराचा आश्रय आहेत.३५. असे जर आहे तर कुणी एक देवदत्त जन्मला तर त्याचे यथाशास्त्र जातक करावे अशी लोकांची आणि शास्त्राचीही मान्यता कां आहे? पूर्वजन्माच्या कर्मापासूनच भवाचा म्हणजे देहाचा उद्भव होतो; तसेच त्या देहाने केलेले कर्म (क्रियमाण) हेच पुढच्या जन्माला कारण होते; अशा परस्पर कार्यकारणभावाने जुडलेले देह आणि कर्म ह्या दोन्हींच्या मुळाशी अज्ञान हेच कारण आहे. ब्रह्मसूत्रांतील दोन अधिकरणानी (२.३.१७-१८) हा विषय स्पष्ट केला आहे. स्थावर अथवा जंगम यांच्या संदर्भांत जन्म-मरण हे शब्द शरीराच्या उत्पत्ती आणि लयाला उद्देशून वापरलेले आहेत. जातकर्मविधान हेसुद्धा देहाच्या उत्पत्तीला अनुलक्षून आहे. त्याला जन्म ही केवळ संज्ञा दिली आहे. पुढच्याच सूत्रांत सांगितले आहे की, जीवात्मा कधीच जन्मत नाही कारण तशा अर्थाची श्रुति नाही; उलट त्याच्या नित्यत्वाचे, अजत्वाचे, अविकारित्वाचे प्रतिपादन करणाऱ्या अनेक श्रुति आहेत. वेगळ्या शब्दांत असे म्हणतां येईल की उपाधींचा जन्म हाच जन्म आहे आणि उपाधींचा नाश हेच मरण आहेत, त्यांचा जीवात्म्याशी कांही संबंध नाही. जन्म आणि कर्म ह्या दोन्हींचा छेद जो तत्त्वज्ञानरूपी खड्गाने करतो तो या जन्ममरणरूपी भ्रमांतून सुटतो.३६.

**अस्यास्त्यविद्यैव घटादिवद्द्यो रुपाधिरात्मत्वमुपाध्यपाये ।**
**मालाहिवत्कल्पित एति नाशं भ्रमोऽस्य सद्दर्शिततत्त्वदीपात् ।।३७।।**

द्योः घटादिवत् अस्य अविद्या उपाधिः अस्ति। उ पाधि+अपाये आत्मत्वम्। सत्+दर्शित+तत्त्व+दीपात् अस्य भ्रमः कल्पित माला+अहिवत् नाशं एति।'३७।

जन्म-मरणाला कारण ही उपाधी कोण आहे? आकाशाला जशा घट, मठ आदि उपाधी असतात, ज्यामुळे आकाश सीमित झाल्यासारखे वाटते, तशाच आत्म्याला परिच्छिन्न भासवणाऱ्या देहादि उपाधी आहेत. घट-मठादि उपाधींचा नाश झाला तरी आकाश जसेच्या तसेच राहते. त्याचप्रमाणे देहादि उपाधींचा नाश झाला तरी निर्विकल्प आत्मस्वरूप निर्बाधच राहते. श्वेताश्वतर उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (६:११) सर्व भूतमात्रांत एकच अंतरात्मा गूढ रूपाने वास करतो; हाच सर्वव्यापी निर्गुण एकमेवाद्वितीय देव सर्वांच्या अंतरांत साक्षित्वाने राहून त्यांच्या कर्माचे नियंत्रण करतो. अविद्येच्या उपाधीने त्याचे विभाजन झाल्यासारखे वाटते आणि तोच ज्ञानमय, मनोमय, प्राणमय इत्यादी स्वरूपांत भासतो; अर्थातच उपाधींचा संबंध सुटल्यावर त्याचे सहज स्वरूपच राहते. बृहदारण्यक उपनिषदांत (४:१५:१३) प्रज्ञानघनाच ह्या भूतांपासून उडून जातो आणि त्या भूतांचा लय होतो असे सांगितले आहे तो उपाधीचाच प्रलय आहे, आत्म्याचा नव्हे.

**ज्ञानदीप -** *सता* म्हणजे संतांनी दाखविलेल्या दिव्याच्या उजेडाने, माळेवर भासणाऱ्या सर्पासारखा, ह्याचा अनादिकालासून प्रतीत झालेला भ्रम नष्ट होतो. '*सता*'चा अर्थ असाही घेता येईल की आपल्या भक्तांच्या अंतःकरणातील सत्यज्ञानानन्त इत्यादि लक्षणाच्या ईश्वराने आपल्या भक्तावरील अतीव करुणेने दर्शविलेला, भक्तीच्या तेलाने भिजवलेली ब्रह्मचर्यादि साधनांच्या संस्कारलेली बुद्धी हीच ज्याची वात, भगवद्भावाच्या अभिनिवेशाच्या वायूने प्रेरलेला, विषयांच्या वाऱ्यापासून रक्षिलेल्या, आणि म्हणून रागद्वेषादि काजळी नसलेल्या चित्तांत ठेवलेल्या विवेकप्रत्ययरूप अशा ज्ञानदीपाच्या, नित्य अभ्यासाने एकाग्र ध्यानाने झालेल्या सम्यक् दर्शनरूपी प्रकाशाने, अज्ञानापासून उद्भवलेला मिथ्याप्रत्ययरूपी मोहांधःकार नाहीसा होतो. '*तेषामेवानुकंपार्थं अहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता।।*' भ.गीता १०-११।।३७.

**तावद्भ्रमान्तौ नियतौ द्युरात्रिवज्जन्तोरतस्तत्त्वविचारवान्भवेत् ।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयात्मशोकतः स्वार्थः कुतः साध्वि समुद्भवेद्वद ।।३८।।**
**तस्माच्छुचं मुञ्च सति प्रसाधय स्वार्थं यथा येन भवं तरिष्यसि ।**
**तत्काल एषैव यदा प्रमादतो याता नृयोनिस्तु पुनर्न तत्कथा ।।३९।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**प्राप्ता धवानामयहेतुनाधुना दैवात्पथेऽस्मिन्दयितो मृतः पितः ।**
**सम्बन्धिनोऽप्यन्तरितास्त्वमेव मे सर्वोऽसि मामुद्धर दुःखसागरात् ।।४०।।**

तावत् जन्तोः भ्रम+अंतौ द्यु+रात्रिवत् नियतौ। अतः तत्त्व+विचारवान् भवेत्। (हे) साध्वि, त्वक्+रक्त+मांस+अस्थि+मय+आत्म+शोकतः कुतः स्वार्थः समुद्भवेत्?३८। तस्मात् (हे) सति, शुचं मुञ्च। स्वार्थं प्रसादय, येन यथा भवं तरिष्यसि। एष एव तत् कालः। यदा प्रमादतो नृ+योनिः याता तु पुनः तत्+कथा न।३९। साध्वी उवाच। धव+अनामय+हेतुना प्राप्ता। दैवात् अस्मिन् पथे दयितः मृतः। पितः सम्बन्धिनः अपि अन्तरिता। त्वं एव मे सर्वः असि। मां दुःख+सागरात् उद्धर।४०।

'तत्त्वज्ञानदीपाने अज्ञानतमाचा नाश होईपर्यंत जीवाला हे जन्मरूपी भ्रम आणि उपाधिनाशरूपी मरण ही दिवस आणि रात्र यांप्रमाणे ठरलेले आहेत. तेवढ्यासाठी विचार-विवेक केला पाहिजे. त्वचा, मांस, रक्त, अस्थी इत्यादींच्या बनलेल्या शरीरासंबंधी शोक करत राहण्याने खरा स्वार्थ - मनुष्यजन्माचे ध्येय जो मोक्ष, तो कसा सिद्ध होणार?३८. याकरिता हे सती, हा शोक आवर आणि पारलौकिक स्वार्थ साध. त्यानेच तू हा भवसागर तरशील. हीच ती वेळ आहे. जोपर्यंत वार्धक्याने इंद्रिये दुर्बल होत नाहीत, शरीर परावलंबी होत नाही तोपर्यंतच हा प्रयत्न करायला हवा. एकदा हा मानव जन्म प्रमादाने हातातून निसटला की पुनः त्याची वार्ताही दुर्लभ होईल.'३९. ती सती म्हणाली, 'माझ्या पतीला आरोग्य व्हावे म्हणून मी दुरून इथे आले आहे. दुर्दैवाने इथे वाटेतच माझ्या पतीला मृत्यू आला. वडीलधारे व इतर संबंधीही दुरावले. आता आपणच माझे सर्व कांही आहात. ह्या दुःखसागरातून मला वर काढा! माझा उद्धार करा' हे सतीच्या मुखांतील शब्द गुरूपसत्तीचे निदर्शक आहेत.४०.

**।। साधुरुवाच ।।**

**भर्तैव तारकं साध्व्या नोपाया बहवो नृवत् । शृण्वगस्त्यसतीस्तोत्र-प्रसङ्गोक्तं वृषं सुरैः ।।४१।।**
**विन्ध्योत्कर्षभियैत्य तद्गुरुमगस्त्यं तद्वधूं निर्जरैः । साकं देवगुरुर्जगौ सति रमा सावित्र्युमारुन्धती ।।**
**इत्याद्या अपि साध्व्य उत्तमतमा तासां त्वमेवास्यहो। छायेवानिशमीशसेवनपरा त्वन्निघ्नमेतज्जगत् ।।४२।।**
**भक्त्या छायेव याश्रान्तं स्वभर्तृपरिचारिणी । पतिरेव व्रतं यस्या अखण्डं सा पतिव्रता ।।४३।।**

साधुः उवाच। 'साध्व्या भर्ता एव तारकः। नृवत् बहवः उपायाः न। सुरैः अगस्त्य+सती+स्तोत्र+प्रसङ्ग+उक्तं वृषं शृणु।'४१। विन्ध्य+उत्कर्ष+भिया तत्+गुरुं अगस्त्यं निर्जरैः साकं एत्य देवगुरुः तत्+वधूं जगौ। '(हे) सति, रमा, सावित्री, उमा, अरुन्धती इत्याद्या साध्व्यः। तासां त्वं एव छाया इव अनिशं ईश+सेवन+परा उत्तमतमा असि। एतत् जगत् त्वत्+निघ्नम्।४२। या भक्त्या छाया इव अश्रान्तं स्व+भर्तृ+परिचारिणी, यस्या पतिः एव अखण्डं व्रतं, सा पतिव्रता।४३।

तेव्हां तो साधू उत्तरला, 'स्त्रियांना पती हाच एकमेव तारक (तारकः) आहे. पुरुषांप्रमाणे त्यांच्यासाठी अनेक उपाय नाहीत. देवांनी अगस्तीची पत्नी लोपामुद्रा हिचे स्तवन करताना प्रसंगाने सांगितलेला (स्त्रियांचा) धर्म मी तुला सांगतो. ऐक.' *'भर्तैव ता रकं'* असा पाठ घेतला तर भर्ता हाच हृदयस्थ तारक ब्रह्म आहे असा अर्थ लावावा.४१. स्कंद पुराणातील कथा आहे. मेरु पर्वताच्या ईर्षेने विंध्य पर्वत आपली उंची वाढवू लागला. वाढत वाढत तो सूर्यमंडलासमोरून स्वर्गभुवनाच्या वर गेला. त्यामुळे त्याच्या दक्षिणेला सूर्यकिरण पोचेनात. अर्थात सर्व यज्ञादिकर्मांचा लोप होऊ लागला. तेव्हा विंध्य पर्वताला नमविण्यासाठी त्याचे गुरू अगस्ती ऋषी यांच्याकडे सर्व देवांसह बृहस्पती गेले. त्या वेळी अगस्तींची पत्नी लोपामुद्रा हिची स्तुती करतांना देवगुरू बृहस्पतींनी स्त्रियांचे धर्म सांगितले. ते म्हणाले, 'हे सती लोपामुद्रे, लक्ष्मी, सावित्री, पार्वती, अरुन्धती इत्यादि महान साध्वी आहेत. पण सावलीसारखी पतीची निरंतर सेवा करणारी तूच सर्व पतिव्रतात श्रेष्ठतम आहेस. जी भक्तिभावाने आपल्या पतीची सावलीसारखी अथक सेवा करते आणि पती हेच जिचे अखंड व्रत आहे ती पतिव्रता.'४३.

**पादाम्बु तीर्थमुच्छिष्टं प्रसादो देवतार्चनम् । तत्सेवा भूषणं तोषो धर्मोऽनुज्ञानुपालनम् ।।४४।।**
**वशानुवर्तनं देह-यात्रा श्वश्र्वादिगौरवम् । लोकयात्रेश्वरो भर्ता करणं पोष्यपोषणम् ।।४५।।**
**कार्यं नाज्ञां विना किञ्चिद् दूरात्स्थेयं स्थिते प्रिये । सुप्तोत्थितात्प्रागुत्थाय सेव्योऽश्रान्तं पतिर्मुदा ।।४६।।**
**तस्मै दत्वेष्टमाप्लुत्य गृहसंमार्जिनादिकम् । दत्वेशायेष्टसंभारा देयाः स्वादु च भोजनम् ।।४७।।**
**क्रुद्धश्चेत्प्रार्थनीयो न गन्तव्यं परसद्मनि । नाज्ञां विना गुरोर्गेहे न वक्तव्यं सदेतरैः ।।४८।।**

पाद+अम्बु तीर्थं, उच्छिष्टं प्रसादो, तत्+सेवा देवता+अर्चनं, तोषो भूषणं, अनुज्ञा+अनुपालनं धर्मः।४४। वश+अनुवर्तनं देहयात्रा, श्वश्रू+आदि+गौरवं लोकयात्रा, भर्ता ईश्वरो, पोष्य+पोषणं करणम्।४५। आज्ञां विना किञ्चित् (अपि) न कार्यम्। प्रिये स्थिते दूरात् स्थेयम्। सुप्त+उत्थितात् प्राक् उत्थाय पतिः अश्रान्तं मुदा सेव्यः।४६। तस्मै इष्टं दत्वा आप्लुत्य गृह+संमार्जन+आदिकम्। ईशाय इष्ट+संभारा, स्वादु भोजनं च देयाः। ४७। क्रुद्धः चेत् प्रार्थनीयः। परसद्मनि न गन्तव्यम्। आज्ञां विना गुरोः गेहे न (गन्तव्यम्)। सदा इतरैः न वक्तव्यम्।४८।

आपल्या पतीच्या पायावरचे पाणी हेच तीर्थ, त्याचे उच्छिष्ट हाच प्रसाद, त्याची सेवा हीच देवपूजा, त्याचा संतोष हाच अलंकार आणि त्याच्या आज्ञेचे पालन हाच धर्म जाणावा.४४. पतीच्या मर्जीनुसार वागणे हीच तिची देहयात्रा आहे तर सासू-सासरे इत्यादींचा मान ठेवणे हीच तिची लोकयात्रा आहे. पती हाच तिचा परमेश्वर आहे. लहान-थोर सर्व पोष्य कुटुंबियांचे पोषण हे तिचे कर्तव्य आहे.४५. पतीच्या आज्ञेवाचून कांहीही करू नये. पती उभा असेल तर आपण मर्यादेने थोडे अंतर ठेवून उभे राहावे. पती झोपून उठायच्या आत आपण उठावे आणि आनंदाने अविश्रांत पतीची सेवा करावी.४६. पतीला हवे ते देऊन स्नानादि करावे आणि घराचा स्नान-सडा करावा. पतीला पूजादिकांसाठी पाणी, फुले इत्यादि इष्ट ती सामुग्री देऊन त्याला रुचकर भोजन द्यावे.४७. पती रागावले तर त्याची विनवणी करावी. दुसऱ्यांच्या घरी जाऊ नये. पतीच्या परवानगीशिवाय आपल्या माहेरी जाऊ नये. सारखे विनाकारण दुसऱ्यांशी बोलू नये.४८.

**मन्दं श्वश्र्वादिसामीप्ये वक्तव्यं सन्धयेशितुः । इष्टं देहीति नो वाच्यं वक्तव्यं परवक्त्रतः ।।४९।।**
**स्वीकार्यं वस्त्रभूषादि भर्त्रा दत्तं यदृच्छया । न निन्द्यो दुर्भगो दीनो दुःशीलोऽपि शिवोपमः ।।५०।।**
**न कार्यं स्वैरिणीसख्यं स्वानां पार्थक्यमप्युत । धार्याः सौभाग्योपचारा न भूषाः प्रोषिते प्रिये ।।५१।।**
**दर्शितव्यं मुखं नर्तौ श्रोतव्यं नागमादिकम् । स्नात्वा चतुर्थेऽह्नि भर्ता प्रेक्ष्यो वाऽसम्भवे रविः ।।५२।।**
**प्रोषितेऽर्च्याज्ञया स्थेयं प्रत्युद्गन्तव्यमागते । सव्रीडहावरत्यङ्घ्रि-सेवाद्यैस्तोषणीय इत् ।।५३।।**

श्वश्रू+आदि+सामीप्ये मन्दं वक्तव्यम्। ईशितुः सन्धया (वक्तव्यम्)। इष्टं देहि इति नो वाच्यम्। पर+वक्त्रतः वक्तव्यम्।'४९। 'भर्त्रा यदृच्छया दत्तं वस्त्र+भूषा+आदि स्वीकार्यम्। न निन्द्यः। दुर्भगः, दानः, दुःशीलः अपि शिव+उपमः।५०। स्वैरिणी+सख्यं न कार्यम्। स्वानां पार्थक्यं अपि। सौभाग्य+उपचाराः धार्याः। प्रिये प्रोषिते भूषाः न (धार्याः)।५१। ऋतौ मुखं न दर्शितव्यं, आगमादिकं न श्राव्यम्। चतुर्थे अह्नि स्नात्वा भर्ता प्रेक्ष्यः। वा असम्भवे रविः (प्रेक्ष्यः)।५२। प्रोषिते अर्च्य+आज्ञया स्थेयम्। आगते प्रत्युद्गन्तव्यम्। स+व्रीड+हाव+रति+अङ्घ्रि+सेवाद्यैः तोषणीयः इत्।५३।

सासू-सासरे इत्यादी वडीलधाऱ्यांशी नम्रतेने आणि हळू बोलावे. पतीशीही मर्यादेने बोलावे. आपल्याला 'अमुक पाहिजे' असे न म्हणता इतरांच्या (पुत्र-कन्या आदि) तोंडून त्यांच्या कानांवर घालावे.४९. पतीने स्वेच्छेने दिलेली वस्त्रे, अलंकार स्वीकारावे. त्याची निंदा करू नये. भाग्यहीन, दरिद्री आणि दुःशील जरी असला तरी तो शिवासमान पूज्य मानावा.५०. स्वैराचारी स्त्रियांशी मैत्री करू नये. आपल्या सासरच्या लोकापासून वेगळे होऊ नये. हळदी, कुंकू, काजळ, शेंदूर आणि लेणी (मंगळसूत्र इत्यादि) हे सौभाग्य उपचार धारण करावेत. पती गावाला किंवा परदेशाला गेल्यावर अलंकार वर्ज्य करावेत.५१. ऋतुकाळी तोंड दाखवू नये, वेदादिक ऐकू नयेत. चौथ्या दिवशी स्नान करून पतीचे तोंड पाहावे. ते शक्य नसेल तर सूर्याचे दर्शन घ्यावे.५२. पती दूर गांवाला गेल्यावर सासू-सासरे इत्यादि वडीलधाऱ्यांच्या आज्ञेने राहावे. पती बाहेरून आल्यावर सामोरे जावे. लज्जा, हावभाव, संभोग, पाय चुरणे इत्यादींनी त्याला संतोषवावे.५३.

**सुप्तेऽस्मिन्च्छयनं कार्यं नोच्चार्यं पतिनाम च । भोक्तुं नान्यत्र गन्तव्यं याच्ञा कार्या न कुत्रचित् ।।५४।।**
**वैषम्येऽपि सुखं कल्प्यं कल्प्येशे दुःखिते न मुत् । त्याज्यमुच्चासनं लीला धवाद्यग्रे हसस्तथा ।।५५।।**
**प्रतिवादाच्छुनी भर्तुरुलूकी गुरुवर्जनात् । पतिं विना स्वादुभुक्त्या वराहोलूकयोनिगा ।।५६।।**
**मूका रोषोक्त्या व्याघ्री स्यात् कृतताडनभाषिणी । सपत्नीवैरतः स्त्री स्याद् दुर्भगा जारगा कृमिः ।।५७।।**
**पत्यौ मृतेऽनुगन्तव्यं स्थेयं वा विधवावृषे । शवाभावे गर्भिणीत्वेऽल्पेऽर्भे वैधव्यपालनम् ।।५८।।**

अस्मिन् सुप्ते शयनं कार्यम्। पति+नाम न उच्चार्यम्। भोक्तुं अन्यत्र न गन्तव्यम्। कुत्रचित् याच्ञा न कार्या।५४। वैषम्ये अपि सुखं कल्प्यम्। ईशे दुःखिते मुत् कल्प्यः। धवादि अग्रे उच्च+आसनं, लीला तथा हसः त्याज्यम्।५५। भर्तुः प्रतिवादात् शुनी, गुरु+वर्जनात् उलूकी, पतिं विना स्वादु+भुक्त्या वराह+उलूक+योनिगा।५६। रोषोक्त्या मूका, कृत+ताडन+भाषिणी व्याघ्री स्यात्। सपत्नी+वैरतः स्त्री दुर्भगा स्यात्। जारगा कृमिः।५७। पत्यौ मृते अनुगन्तव्यं वा विधवा+वृषे स्थेयम्। शव+अभावे, गर्भिणित्वे, अल्पे अर्भे वैधव्य+पालनम्।५८।

दारिद्र्यादि विषम काळातही सुख मानावे; मन प्रसन्न ठेवावे. पती दुःखात असेल तर आपण आनंद मानू नये. पती, सासू, सासरे इत्यादींच्या समोर उच्च आसनावर बसू नये, खेळू नये किंवा मोठ्याने हसू नये.५४. पतीला झोप लागल्यावर आपण झोपावे. पतीच्या नावाचा उच्चार करू नये. जेवणासाठी इतरांच्या घरी जाऊ नये. कुणाजवळही याचना करू नये.५५. नवऱ्याला उलट उत्तरे देणारी कुत्र्याच्या जन्माला जाते. सासू-सासऱ्यांची वंचना करणारी जन्मांतरी घुबडी होते. पतीला सोडून गोड खाणारी डुकराच्या किंवा घुबडाच्या जन्माला जाते.५६. पतीला रागाने बोलणारी जन्मांतरी मुकी होते. 'मला पतीने मारले' अशी चहाडी करणारी वाघीण होते. सवतीशी वैर करणारी दरिद्री होते. जारकर्म करणारी किड्याच्या जन्माला जाते.५७. पतीच्या मृत्यूनंतर सहगमन करावे किंवा विधवाधर्माने राहावे. विशेषतः पतीचे शव मिळत नसेल, किंवा स्त्री गरोदर असेल वा तिचे लहान मूल असेल तर सहगमन न करता विधवाधर्माचे पालन करावे.५८.

**शिरसो वपनं कार्यं भुवि शय्या सकृद्भुजिः । वर्ज्यास्ताम्बूलगन्धादि सुभोगा मंगलाप्लुतिः ।।५९।।**
**त्याज्याः सौभाग्योपचारा धार्यं गौरांशुकं सदा । राधमाघोर्जेषु कार्यं स्नानदानव्रतादिकम् ।।६०।।**
**शक्तौ चान्द्रायणं कार्यं भोज्यं वाज्यफलादिकम्। यत्प्रियं सति पत्यौ तद्देयं विप्राय भक्तितः ।।६१।।**
**मासव्रतं च कल्पोक्तं कार्यं यद्यत्तु वर्जितम् । देयं विप्राय चोष्णाम्बु तोषणीयस्तु तैर्थिकः ।।६२।।**

शिरसः वपनं कार्यं, भुवि शय्या, सकृत् भुजिः। ताम्बूल+गन्धादि, सुभोगा, मंगल+आप्लुतिः वर्ज्याः।५९। सौभाग्य+उपचाराः त्याज्याः। सदा गौर+अंशुकं धार्यम्। राध+माघ+ऊर्जेषु स्नान+दान+व्रतादिकं कार्यम्।६०। शक्तौ चान्द्रायणं कार्यम्। वा आज्य+फल+आदिकं भोज्यम्। पत्यौ यत् प्रियं सति तत् विप्राय भक्तितः देयम्।६१। कल्प+उक्तं मास+व्रतं च कार्यम्। यत् यत् तु वर्जितं उष्ण+अम्बु च विप्राय देयम्। तैर्थिकः तोषणीयः।६२।

**विधवाधर्मा**चे निरूपण करतात. डोक्यावरचे केस काढावेत. जमिनीवर झोपावे. रोज एक वेळच जेवावे. विडा, गंध, पुष्प इत्यादि छानछौकीच्या वस्तू सोडाव्या. मंगलस्नान करू नये.५९. हळदी-कुंकू इत्यादि सौभाग्य चिह्नांचा त्याग करावा. नेहमी पांढरे किंवा लाल वस्त्र नेसावे. वैशाख, माघ आणि कार्तिक या महिन्यांत स्नान, दान, व्रत इत्यादींचे आचरण करावे.६०. शक्ती असेल तर चांद्रायण करावे; किंवा तूप, फळे इत्यादींवर राहावे. पती असतांना जे पदार्थ आपल्या आवडीचे असतील ते ब्राह्मणाला भक्तीपूर्वक दान करावे.६१. कल्पांत (शास्त्रांत) सांगितलेले मासाचे व्रत विशिष्ट पदार्थ सोडणे, थंड पाण्याने स्नान करणे इत्यादि, आचरावे. जे जे आपण सोडलेले ते ते पदार्थ ब्राह्मणाला दान करावे. तसेच ब्राह्मणाला ऊन पाणी द्यावे. तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांना दानादिकांनी संतुष्टवावे.६२.

**पुत्रे तदाज्ञया स्थेयं सम्पूज्यः पतिवद्धरिः । गुरुगोऽतिथिसद्विप्राः पूज्यास्त्याज्यं कुभोजनम् ।।६३।।**
**हरिलीलारतिः कार्याऽपुत्रया पितृतर्पणम् । गोप्यं शीलं स्वकैः सार्धं तद्वैगुण्यादधोगतिः ।।६४।।**
**एतद्धर्माश्रयात्साध्वी दुर्गतिस्थमपि प्रियम् । प्रसह्योद्धृत्य चिल्लीव सर्पं स्वर्विशति ध्रुवम् ।।६५।।**
**लोपामुद्रे त्वत्ततोऽसौ सतीधर्मोऽत्र तारकः । एवं जीवोक्तधर्मस्ते मयोक्तः स्वेच्छयाचर ।।६६।।**

पुत्रे (सति) तत्+आज्ञया स्थेयम्। हरिः पतिवत् पूज्यः। गुरु+गो+अतिथि+सत्+विप्राः पूज्याः। कुभोजनं त्याज्यम्।६३। हरि+लीला+रतिः कार्या। अपुत्रया पितृ+तर्पणम् (कार्यम्)। शीलं गोप्यम्। तत्+वैगुण्यात् स्वकैः सार्धं अधोगतिः।६४। एतत्+धर्म+आश्रयात् साध्वी दुर्गतिस्थं अपि प्रियं चिल्ली सर्पं इव प्रसह्य उद्धृत्य ध्रुवं स्वः विशति।६५। (हे) लोपामुद्रे, त्वत्+ततः असौ सती+धर्मः तारकः। एवं जीव+उक्त+धर्मः मया उक्तः। स्व+इच्छया आचर।६६।

मुलगा असेल तर त्याच्या आज्ञेत राहावे. विष्णूची पतीभावाने पूजा करावी. गुरू, गोमाता, अतिथी आणि योग्य ब्राह्मण यांची पूजा करावी. कांदा, लसूण इत्यादि निषिद्ध पदार्थ खाऊ नयेत. कारण मनुस्मृतीनुसार (११:५६) ते सुरापानासमान आहेत. (*ब्रह्मोझ्झं वेदनिन्दां च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः। गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट्।।*)६३. भगवंताच्या लीलांचे भक्तिपूर्वक श्रवण करावे. पुत्र नसेल तर पत्यादि त्रयी आणि पित्रादि त्रयींना उद्देशून तर्पण करावे. शीलाचे संरक्षण करावे. त्यांत वैगुण्य आले तर पूर्वजांसह आपण अधोगतीला जातो.६४. ह्या विधवाधर्माच्या आश्रय घेणारी साध्वी, पती नरकांत जरी असला तरी, घारीने सर्पाला ओढून आकाशांत न्यावे तसे त्याला तेथून बळाने खेचून काढून दीर्घकाल स्वर्गाला घेऊन जाते.६५. हा धर्म सांगून झाल्यावर बृहस्पती म्हणाले, 'लोपामुद्रे, तुझ्यासारख्या सतींपासून विस्तारलेला हा पतिव्रताधर्म खरोखर तारक आहे.' श्रीगुरू म्हणतात, 'बृहस्पतींनी प्रतिपादलेला हा धर्म मी तुला सांगितला. आतां तू तुला जे रुचेल तेच कर. पतीच्या मृत्यूनंतर जी नारी ब्रह्मचर्याचे पालन करते ती जरी निपुत्रिक असली तरी मनुस्मृतीत (५:१६०) तिला ब्रह्मचाऱ्यांप्रमाणे स्वर्गवासाचे फळ सांगितले आहे.' (*मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यं व्यवस्थिता। स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः।।*)६६.

**भेवार्कं पतिमन्वेहि रोचतेऽनुगमो यदि । स्वर्याति गौरवाद्येन प्रोद्धृत्येशं यमादपि ।।६७।।**
**प्रत्यङ्घ्र्यश्वक्रतुफलं कोट्यब्दं प्रतिरोमतः । स्वर्वासः सार्धत्रिकोटि-रोमहोमात्प्रियान्वितः ।।६८।।**
**रूपलावण्यसंपन्नाः स्त्रियः सन्ति गृहे गृहे । ताभिः किं कार्यमेकैव साध्वी त्रिकुलपावनी ।।६९।।**
**क्ष्मावातोऽर्कोऽग्निर्बिभेति स्वत्रासोऽस्या भवेदिति । तिष्ठन्ति प्रणता देवाः स्वपदच्युतिशङ्कया ।।७०।।**

यदि अनुगमः रोचते, अर्कं भा इव पतिं अन्वेहि। येन यमात् अपि ईशं प्रोद्धृत्य गौरवात् स्वः याति।६७। प्रति+अंघ्रि अश्वक्रतु+फलं, सार्धत्रिकोटि+रोम+होमात् प्रतिरोमतः प्रिया अन्वितः कोटि+अब्दं स्वः+वासः।६८। रूप+लावण्य+संपन्नाः स्त्रियः गृहे गृहे सन्ति। ताभिः किं कार्यम्? एक एव साध्वी त्रि+कुल+पावनी।६९। अस्याः स्व+त्रासः भवेत् इति क्ष्मा+वातः+अर्कः+अग्निः बिभेति। देवाः स्व+पद+च्युति+शंकया प्रणताः तिष्ठन्ति।७०।

'तुला जर सहगमनाची आवड असली तर, सूर्यासह जशी त्याची प्रभा जाते तशी तू पतीसह जा. त्यायोगे तू पतीला यमापासूनही बळाने खेचून, देवादिकांनी केलेल्या सत्कारपूर्वक स्वर्गांत जाशील.'६७. 'सहगमन करणारी स्त्री प्रत्येक पावलागणिक एकेका अश्वमेधाचे पुण्य मिळवीत असते. सती आपल्या शरीराच्या साडेतीन कोटी रोमांची आहुती देते. त्या प्रत्येक रोमासाठी एक ती एकेक कोटी वर्षे पतीसह स्वर्गांत वास करते.६८. सौंदर्य आणि लावण्य मिरविणाऱ्या स्त्रिया काय घरोघरी आहेत. त्यांना घेऊन काय करायचे? एक जरी पतिव्रता सती असली तरी ती पित्याच्या, मातेच्या आणि पतीच्या अशा तीन कुळांना पावन करते.६९. 'ह्या पतिव्रतेला आपल्यामुळे कष्ट तर होणार नाहीत ना?' अशा शंकेने पृथ्वी, वायू, सूर्य आणि अग्नी हे धास्तावलेले असतात. सर्वही देव तिने आपल्याला पदापासून काढू नये म्हणून हात जोडून नम्रतेने उभे असतात.७०.

**साध्व्या इयान्प्रभावोऽस्ति धन्यैषा पितृतारका । धिग्दुःशीलामधःशेते या चिरं त्रिकुलैः समम् ।।७१।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**वैधव्यपालनं कष्टं तारुण्याद्यत्र घातकम् । प्रीतिर्धवानुगमने नूनं मे वर्धते गुरो ।।७२।।**

**।। साधुरुवाच ।।**

**साधु साध्वि तदिष्टं ते मा शुचो दैवमुन्नतम् । आयुष्मद्भीष्मपौलस्त्य-मुखाः कालवशं गताः ।।७३।।**
**कालोऽजय्योऽमरैश्चापि दुर्धरः सद्गुरुं विना । गुरुदर्शनकामाप्ता दूरात् तत् त्वं समाचर ।।७४।।**

'साध्व्या इयान् प्रभावः अस्ति। एषा पितृतारका धन्या। या त्रिकुलैः समं चिरं अधः शेते (तां) दुःशीलां धिक्।७१। साध्वी उवाच। वैधव्य+पालनं कष्टम्। अत्र तारुण्य आदि घातकम्। (हे) गुरो मे धव+अनुगमने प्रीतिः वर्धते।७२। साधुः उवाच। 'साधु! (हे) साध्वि तत् ते इष्टम्। मा शुचः। दैवं उन्नतम्। आयुष्+मत्+भीष्म+ पौलस्त्य+मुखाः कालवशं गताः।'७३। 'कालः अमरैः अपि अजय्यः। सद्गुरुं विना दुर्धरः। त्वं दूरात् गुरु+दर्शन+काम+आप्ता। तत् समाचर।७४।

'एवढा साध्वीचा प्रभाव असतो. सर्व पितर तारणारी ती पतिव्रता खरोखरच धन्य होय. तिच्या उलट तिन्ही कुळांना दीर्घ नरकवासाला घेऊन जाणाऱ्या दुर्वर्तनी स्त्रीचा धिक्कार करावा तेवढा थोडाच आहे.'७१. त्या तापसाचे बोलणे ऐकून ती साध्वी म्हणाली, 'विधवेच्या धर्माचे आचरण फारच कष्टप्रद वाटते. शिवाय माझे तारुण्यादि माझ्या घाताला कारण होण्याची भीती वाटते. गुरुमहाराज, हा सर्व विचार करून मला पतीच्या मागे सहगमन करण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे.'७२. साधू म्हणाले, 'छान बोललीस! तेच तुझ्या कल्याणाचे आहे. शोक करू नकोस. दीर्घायुषी म्हणविलेले भीष्म आणि रावण आदिसुद्धा मृत्यूचे ग्रास झालेच ना?७३. काळ हा देवादिकांनासुद्धा अजिंक्य आहे. सद्गुरूंवाचून त्याचा सामना करणे अशक्य आहे. तू लांबून श्रीगुरुदर्शनाच्या इच्छेने आली आहेस तर ते तू कर.'७४.

**स्नात्वा पीताम्बरं धृत्वा प्रायश्चित्तपुरःसरम् । सौभाग्यवायनान्यङ्ग सपत्नीकद्विजेभ्य इत् ।।७५।।**
**दत्वा श्रुत्योर्गले चेमान् बध्वाक्षान्भस्म मस्तके । लिप्त्वाङ्गं गुरुपादाद्भिः प्रोक्ष्येशमनुयाह्यियि ।।७६।।**
**इत्युक्त्वा भस्मरुद्राक्षान् दत्वागात्सोऽपि सा द्विजान् । आहूयादात्सुसौभाग्य-दानानि बहुशो मुदा ।।७७।।**
**प्राहानुगान्यात गृहमुमेशौ पितरौ मम । यास्ये तत्रात्र हर्षात्स्वरिति वाच्यं गुरूनप्रति ।।७८।।**
**इत्युक्त्वा नीयमानस्य पत्युरग्निकराग्रतः । गच्छन्ती मन्थरोमेव रेजे मुद्रूपिणी सती ।।७९।।**

'(हे) अङ्ग, स्नात्वा, पीताम्बरं धृत्वा सपत्नीक+द्विजेभ्यः सौभाग्य+वायनानि दत्वा,।७५। इमान् अक्षान् श्रुत्योः गले च बध्वा, मस्तके भस्म लिप्त्वा, ईशं गुरु+पाद+अद्भिः प्रोक्ष्य अनुयाह्यहि।७६। इति उक्त्वा भस्म+रुद्राक्षान् दत्वा सः अगात्। सा अपि द्विजान् आहूय मुदा बहुशः सौभाग्य+दानानि अदात्।७७। अनुगान् प्राह, गृहं यात। उमा+ईशौ मम पितरौ, तत्र यास्ये। अत्र हर्षात् स्वः इति गूरून् प्रति वाच्यम्।७८। इति उक्त्वा नीयमानस्य पत्युः अग्रतः अग्निकरा मन्थरा गच्छन्ति सती उमा इव रेजे।७९।

'बाळे, स्नान करून पीतांबर धारण करून ब्राह्मणांना व सुवासिनींना सौभाग्याची वाणे देऊन,७५. हे रुद्राक्ष पतीच्या कानांत व गळ्यांत बांधून, त्याच्या कपाळावर भस्म लेपून, श्रीगुरूंच्या पायाचे तीर्थ त्याच्यावर शिंपून मग तू सहगमन कर.'७६. असे बोलून आणि भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन तो तापसी आपल्या वाटेने निघून गेला. त्या साध्वीनेही मग ब्राह्मणांना सपत्नीक बोलावून आनंदाने विपुल सौभाग्य वस्तूंचे दान केले.७७. आपल्या सोबत आलेल्या लोकांना तिने बोळवले. म्हणाली, 'गांवाकडे घरी जा. शिव आणि पार्वती हेच माझे मातापिता आहेत. आम्ही त्यांच्याकडे जातो. आम्ही उभयतां इथे आनंदांत आहोत असे माझ्या सासू-सासऱ्यांना सांगा.'७८. असे बोलून स्मशानाकडे चालविलेल्या पतीच्या प्रेतापुढे अग्नी हातांत घेऊन हळूहळू जाणारी ती सती साक्षात् पार्वतीप्रमाणे शोभत होती.७९.

**भर्तृसौख्यानभिज्ञेयं षोडशाब्दातिसुंदरी । कुलोद्धर्त्री सुधन्येति स्तूयमाना जनैर्ययौ ।।८०।।**
**श्मशानमेत्य संस्कृत्य कुण्डेऽग्निं वायनादिभिः । सुवासिनीस्तोषयित्वा सस्मार गुरुभाषितम् ।।८१।।**
**लिप्त्वाङ्गे भस्म बध्वाक्षान् पत्युर्विप्राज्ञया गुरुम् । द्रष्टुकामा ययौ साध्वी संगमं तं स्तुवन्त्यजम् ।।८२।।**
**दाता सर्वेश्वरस्त्वं शरणमपि सतां त्र्यात्मको विश्वसर्ग-**
**स्थित्यन्तानां निदानं ततबिरुदचयः श्रीहरिस्त्वं दयाब्धिः ।**
**मत्तुल्यास्त्वत्कृपांशात्सुपतिसुतसुखाः सन्ति नार्योऽज यास्ये**
**स्वर्भूत्वा पूर्णकामा पतिसुतमुदिता कीर्तिमादाय तेऽद्य ।।८३।।**

भर्तृ+सौख्य+अनभिज्ञा इयं षोडश+अब्दा अतिसुंदरी कुल+उद्धर्त्री सुधन्या इति जनैः स्तूयमाना ययौ।८०। श्मशानं एत्य, कुंडे अग्निं संस्कृत्य, वायनादिभिः सुवासिनीः तोषयित्वा गुरु+भाषितं सस्मार।८१। पत्युः अङ्गे भस्म लिप्त्वा, अक्षान् बध्वा, गुरुं द्रष्टु+कामा साध्वी विप्र+आज्ञया, तं अजं स्तुवन्ति संगमं ययौ।८२। 'त्वं सतां अपि शरणं त्रि+आत्मकः विश्व+सर्ग+स्थिति+अंतानां निदानं सर्वेश्वरः तत+बिरुद+चयः श्रीहरिः दाता दया+अब्धिः। '(हे) अज, मत्+तुल्याः त्वत्+कृपा+अंशात् सुपति+सुत+सुखाः नार्यः सन्ति। अद्य पूर्ण+कामा पति+सुत+मुदिता ते कीर्तिं आदाय स्वः यास्ये।'८३।

'पहा हो ही सोळा वर्षांची सुकुमार सुंदर मुलगी, जिला पतिसुख म्हणजे काय हेसुद्धा ठाउक नाही, सहगमन करून कुळांचा उद्धार करते आहे. ही खरोखर धन्य धन्य आहे,' अशी लोकांची स्तुतिसुमने ऐकत ती जात होती.८०. स्मशानांत येऊन कुंडांतील अग्नीवर संस्कार करून तिने सुवासिनींना वाणे दिली आणि तिला गुरूंचे भाषण आठवले.८१. त्यांनी सांगितल्याप्रमाणे पतीच्या शरीराला भस्म लावून त्याच्या गळ्यात आणि कानांत रुद्राक्ष बांधले आणि सद्गुरूंच्या दर्शनाच्या इच्छेने ब्राह्मणांच्या परवानगीने ती त्या परमात्म्याची स्तुती करीत संगमाकडे निघाली.८२ त्या सतीच्या स्तुतीत सद्गुरूंवर परमेश्वरासारखी निष्ठा आहेच; पण तिचे दुःख, घोर निराशाही आहेत. सर्वसामर्थ्यशाली सद्गुरूंसमोर हे सर्व भाव व्यक्त करतांना तिने उपरोधाचाही अवलंब केला आहे. त्यामुळे ही स्तुती अत्यंत हृदयस्पर्शी झाली आहे.८३.

**मृतो जीवितो रुग्ण आरोग्यमाप्तो गतः शर्म भीतोऽपि दीनोऽर्थयुक्तः ।**
**गतः प्राज्ञतामज्ञ ईश प्रभावात्तवाहं धवाढ्याद्य सायुज्यमेष्ये ।।८४।।**
**एवं स्तुवन्ती पथि साञ्जनाश्रुलीढस्तनस्वर्णघटा हठात्स्वाम् ।**
**उद्धर्तुकामापि समं धवेन जवेन सागत्य हरिं ननाम ।।८५।।**
**आयान्तीं प्रणतां देवस्त्वं सौभाग्यवती भव । अष्टपुत्रा पुनश्चेति भगवान्प्रीत आह ताम् ।।८६।।**

'(हे) ईश, तव प्रभावात् मृतः जीवितः, रुग्णः आरोग्यं आप्तः, भीतः अपि शर्म गतः, दीनः अर्थ+युक्तः, अज्ञः प्राज्ञतां गतः। अद्य धव+आढ्या सायुज्यं एष्ये।'८४। एवं स्तुवन्ती स+अञ्जन+अश्रु+लीढ+स्तन+स्वर्ण+घटा हठात् स्वां धवेन समं उद्धर्तु+कामा अपि सा जवेन आगत्य हरिं ननाम।८५। देवः आयान्तीं प्रणतां तां 'त्वं सौभाग्यवती भव' इति आह। पुनः 'अष्ट+पुत्रा' इति च भगवान् प्रीतः आह।८६।

'हे भगवंता, तू साधूंचा आणि धर्माचा त्राता आहेस. तूच ब्रह्मा-विष्णू-शिव या तीन रूपांनी विश्वाच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचा कर्ता आहेस, कारण तूच सर्वांचा ईश्वर आहेस. तुझी बिरुदावली त्रैलोक्यांत पसरलेली आहे. तूच श्रीहरी आणि तूच दयासागर दाता आहेस. तुझ्या कृपालेशाने किती तरी स्त्रियांना पती आणि पुत्र यांचे सुख लाभलेले आहे. आज मीसुद्धां पती आणि पुत्र यांचे सुखाने हर्ष पावून पूर्णकाम झाले आहे; आणि तुझी कीर्ती घेऊन स्वर्गाला जाते आहे!८४. 'देवा रे, तुझ्या प्रभावाने मेलेलाही (माझा पती) जिवंत झाला, रोग्याला आरोग्य मिळाले, आर्ताला सुख मिळाले, दरिद्री धनवान झाला आणि अज्ञानीही ज्ञानवान् झाला. आज मी पतीसह मी तुझे सायुज्य प्राप्त करीत आहे!८५. अशी उपरोधात्मक स्तुती करीत, काजळाने काळवंडलेल्या अश्रूंनी आपले सोन्याच्या घटासारखे स्तन भिजवीत, आपल्या व पतीच्या उद्धाराच्या तीव्र इच्छेने, वेगाने श्रीगुरूंसमोर येऊन तिने त्यांना नमस्कार केला. आपल्या समोर येऊन नमस्कार करणाऱ्या त्या सतीला पाहून श्रीगुरुदेव 'तूं सौभाग्यवती हो', असे म्हणाले; तसेच पुन्हा प्रेमाने 'अष्टपुत्रा हो' असेही म्हणाले.८६.

**तच्छ्रुत्वा चकिता लोकाः शशंसुः सर्वमादितः । प्रभुः प्राह न मे वाक्यं मोघं शवमिहानय ।।८७।।**
**अत्रान्तरे द्विजा एत्य रौद्र्यानर्चुर्गुरुं तदा । आनीतं शवमुद्वीक्ष्य सुधादृष्ट्या स्वसंनिधौ ।।८८।।**
**स्थापयित्वा स तं रौद्र-मन्त्रिताद्भिस्तनुं समाम् । स्नापयामास सोऽकस्मात् सुप्तोत्थितवदुत्थितः ।।८९।।**
**तदा हर्षाश्रुपूर्णाक्षी लज्जितं विस्मितं पतिम् । प्रेम्णा शशंस तत्सर्वमूचतुः प्राञ्जली उभौ ।।९०।।**

तत् श्रुत्वा चकिताः लोकाः सर्वं आदितः शशंसुः। प्रभुः प्राह, 'मे वाक्यं मोघं न। शवं इह आनय।'८७। अत्र+अंतरे द्विजा एत्य गुरुं रौद्र्यान् अर्चुः। तदा आनीतं शवं सुधा+दृष्ट्या उद्वीक्ष्य तं स्व+संनिधौ।८८। स्थापयित्वा, सः समां तनुं रौद्र+मंत्रित+अद्भिः स्नापयामास। सः अकस्मात् सुप्त+इत्थित इव उत्थितः।८९। तदा लज्जितं विस्मितं पतिं हर्ष+अश्रु+पूर्ण+अक्षी तत् सर्वं प्रेम्णा शशंस। उभौ प्राञ्जलिः ऊचतुः।९०।

ते ऐकून विस्मित झालेल्या लोकांनी श्रीगुरूंना पहिल्यापासून सर्व हकीकत सांगितली. प्रभू म्हणाले, 'माझे वचन कधीच निष्फल होत नाही. ते प्रेत इथे घेऊन या.'८७. इतक्यात ब्राह्मणांनी येऊन श्रीगुरूंची रुद्रमंत्रांनी पूजा केली. तोपर्यंत लोकांनी आणलेल्या प्रेतावरून आपली अमृतदृष्टी फिरवून ते शव आपल्याजवळ ठेवायला लावले,८८. आणि त्याला रौद्रमंत्रांनी अभिमंत्रित केलेल्या जलाने स्नान करविले. त्या वेळी तो सतीचा मृत पती झोपेतून उठावा तसा अकस्मात् उठून बसला.८९. तेव्हां सर्व लोकांना लाजणाऱ्या आणि विस्मित झालेल्या आपल्या पतीला त्या सतीने आनंदाश्रूंनी पाणावलेल्या डोळ्यांनी सर्व कांही सांगितले. त्या वेळी त्या दोघांनीही हात जोडून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली.९०.

**आवां स्वो दुर्धियौ पापौ भवत्स्मृतिपरायुखौ । तथापि त्वं दयासिन्धो सच्चिदानन्द हंसि नो ।।९१।।**
**जगद्गुरो विश्वमूर्ते परमात्मन्त्राहि विश्वप । विश्वसाक्षिन्विश्वसंस्थ सर्वानन्दनिधे हरे ।।९२।।**
**कर्ताऽकर्ताऽन्यथाकर्ता त्वमेवासि पुमर्थदः । आवाभ्यामपराद्धं तत् क्षामये त्वाद्य कात्स्न्र्यतः ।।९३।।**
**एवं तौ बहुशो नत्वा प्रणतीश्चक्रतुर्मुदा । तच्चित्रं प्रेक्ष्य लोकोऽपि तुष्टाव परमेश्वरम् ।।९४।।**

'आवां दुर्धियौ, पापौ, भवत्+स्मृति+पराङ्मुखौ स्वः। तथापि (हे) दया+सिन्धो (हे) सच्चिदानंद, त्वं नो हंसि।'।९१। '(हे) जगद्+गुरो, विश्व+मूर्ते, परमात्मन्, विश्व+प, विश्व+साक्षिन्, विश्व+संस्थ, सर्व+आनन्द+निधे, हरे, त्राहि।९२। त्वं एव कर्ता, अकर्ता, अन्यथा+कर्ता, पुं+अर्थदः असि। आवाभ्यां अपराद्धं तत् अद्य त्वां कात्स्न्र्येन क्षामये।'९३। एवं तौ बहुशः मुदा नत्वा प्रणतीः चक्रतुः। तत् चित्रं प्रेक्ष्य लोकः अपि परमेश्वरं तुष्टाव।९४।

'आम्ही पापी आणि दुष्ट बुद्धीचे असून तुझ्या स्मरणालाही विमुख आहो. तरी हे दयासागरा, सच्चिदानंदा, तू आमचा घात न करता रक्षणच करतोस.'९१. 'अहो जगद्गुरो, विश्व हेच ज्यांचे मूर्त स्वरूप आहे अशा परमात्मा, जगाचे पोषण करणाऱ्या, जगत्साक्षी, जगच्या अधिष्ठाना, सर्व आनंदाच्या निधाना, हरे, आमचे रक्षण कर.९२. तूच कर्ता, अकर्ता, अन्यथाकर्ता तसेच सर्व पुरुषार्थांचा दाता आहेस. आमचे उभयतांच्या सर्वही अपराधांची आज क्षमा मागते.' (एकवचनी क्रियापदाच्या योजनेवरून ही क्षमायाचना ती सती करते आहे असे समजावे.)९३. अशा तऱ्हेने त्या दंपतीने श्रीगुरूंना आनंदभराने वारंवार वाकून अनेक वेळा नमस्कार केला. हा चमत्कार पाहून तिथे जमलेल्या लोकांनीही श्रीगुरुदेवांची स्तुती केली.९४.

**तत्रैको धूर्त आहेशं केऽस्ति ब्रह्मलिपिर्न वा । नाल्पो मृत्युर्महानेष सास्ति चेज्जीवितः कुतः ।।९५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धात्रात्र लिखितं त्रिंशदायुरेष्यभवे शतम् । याच्ञयैष्यं शतं त्वत्र गृहीत्वा व्यस्तमाचरम् ।।९६।।**
**तच्छ्रुत्वा मिलिता लोका उच्चैश्चक्रुर्जयध्वनिम् । स्ववासिश्रोत्रविवर-विश्रान्तिमघमर्षणम् ।।९७।।**
**दम्पती प्राह भगवानायुष्मन्तौ निरामयौ । सुपुत्रधनकीर्त्याढ्यौ लोकवन्द्यौ भविष्यतः ।।९८।।**

तत्र एको धूर्तः ईशं आह। के ब्रह्म+लिपिः अस्ति वा न? एष मृत्युः अल्पः न, महान (अस्ति)। (लिपिः) अस्ति चेत् सः कुतः जीवितः?९५। श्रीगुरुः उवाच । अत्र धात्रा त्रिंशत् आयुः लिखितम्। एष्य+भवे शतम्। अत्र तु याच्ञया एष्यं शतं गृहीत्वा व्यस्तं आचरम्।९६। तत् श्रुत्वा मिलिता लोकाः उच्चैः स्वः+वासि+श्रोत्र+विवर+विश्रान्तिं अघमर्षणं जय+ध्वनिं चक्रुः।९७। भगवान दम्पती प्राह, 'आयुष्मन्तौ, निरामयौ, सुपुत्र+धन+कीर्ति+आढ्यौ लोक+वन्द्यौ भविष्यतः।'९८।

तिथे एक धूर्त (चिकित्सक, बुद्धिवादी) होता. तो श्रीगुरूंना म्हणाला, 'कपाळावर ब्रह्मदेवाचा लेख असतो की नाही? हा कांही टाळता येण्यासारखा अल्प मृत्यू नव्हता. दीर्घकाळ क्षयानंतर आलेला हा मृत्यू महान - काळमृत्यूच असला पाहिजे. जर ब्रह्मदेवाने हेच त्याच्या कपाळी लिहिले असेल तर कसा जिवंत झाला?'९५. श्रीगुरूंच्या अघटितघटनापटुत्वाची एवढी प्रत्यक्ष प्रचीती आलेली असूनही श्रद्धेच्या अभावी त्याने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर श्रीगुरू त्याच्याच भाषेत देत आहेत. ते म्हणाले, 'खरे आहे, ब्रह्मदेवाने या जन्मात याला तीस वर्षेच आयुष्य लिहिलेले आहे. पण पुढच्या जन्मात शंभर वर्षे आयुष्य लिहिलेले आहे. ते मागून घेऊन आम्ही या जन्मात शंभर व पुढच्या जन्मात तीस अशी अदलाबदल केली आहे.'९६. ते ऐकून तिथे जमलेल्या लोकांनी जो पापनाशक जयजयकार केला तो स्वर्गांतील देवांच्या कर्णरंध्रांत जाऊनच विसावला.९७. श्रीगुरू भगवान त्या दंपतीला म्हणाले, 'तुम्ही दीर्घायुषी, आरोग्यसंपन्न, पुत्रवान, धनसंपन्न, कीर्तिमान होऊन लोकांत पूज्यता पावाल.'९८.

**श्रुत्वा गुरोर्गां प्रमुदान्वितावुभौ स्नात्वा गुरोश्चक्रतुरर्चनं तदा ।**
**अस्तं गतोऽर्कोऽप्यज आह्निकीं क्रियां कृत्वा मठं सर्वजनैः सहाययौ ।।९९।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे मृतसंजीवनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

**आदितः षोडशोऽध्यायः ।।१६।। ।। श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ।। ।। श्रीगुरुदेव दत्त ।।**

गुरोः गां श्रुत्वा तौ उभौ प्रमुदितान् स्नात्वा गुरोः अर्चनं चक्रतुः। तदा अर्कः अपि अस्तं गतः। अजः आह्निकीं क्रियां कृत्वा सर्वजनैः सह मठं आययौ।९९।

हे श्रीगुरूंचे आशीर्वचन हे ऐकून त्या दंपतीला अत्यंत हर्ष झाला. त्यांनी स्नान करून श्रीगुरूंचे पूजन केले. एवढ्यांत सूर्यही अस्तमानाला गेला. श्रीगुरूंनीही सायंकाळचे आह्निक केले आणि सर्व लोकांसह मठांत परतले.९९.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला तिसरा आणि प्रथमपासून सोळावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। सप्तदशोऽध्यायः ।।

### ।। सिद्ध उवाच ।।

**अन्येद्युराह साध्वीशं पूर्वेद्युः कश्चनैत्य सन् । तत्त्वज्ञानेन माश्वास्य भस्माक्षान्चतुरो ददौ ।।१।।**
**प्राह दृष्ट्वा गुरूं तीर्थैः पतिं प्रोक्ष्यानुयाहि तम् । इत्युक्त्वागात्स कस्तीर्थ-रुद्राक्षमहिमा कियान् ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**रूपान्तरेण ते भावो मयैवाङ्ग परीक्षितः । धन्यासि सुभगे साध्वि तीर्थाक्षमहिमा त्वियान् ।।३।।**

सिद्ध उवाच। अन्येद्युः साध्वी ईशं आह। पूर्वेद्युः कश्चन सन् एत्य मां तत्त्वज्ञानेन आश्वास्य भस्म (एवं) चतुरः अक्षान् ददौ।१। (सः) प्राह, गुरुं दृष्ट्वा पतिं तीर्थैः प्रोक्ष्य तं अनुयाहि। इति उक्त्वा अगात्। सः कः? तीर्थ-रुद्राक्ष+महिमा कियान्?२। श्रीगुरुः उवाच। (हे) अङ्ग, मया एव रूपान्तरेण ते भावः परीक्षितः। (हे)साध्वि, सुभगे, धन्या असि! तीर्थ+अक्ष+महिमा तु इयान्।३।

श्रीगणेशाय नमः। *रुद्राक्षाचे आणि भस्माचे माहात्म्य सतरावीं सतीप्रती। मंत्रोपदेशाचा न अधिकार स्त्रियांना म्हणुनी सोमवारव्रत उपदेशिती।।* सिद्ध पुढे नामधारकाला सांगतात. दुसऱ्या दिवशी त्या साध्वीने श्रीगुरूंना विचारले, 'काल कुणी एक साधूंनी येऊन माझे तत्त्वज्ञानाच्या उपदेशाने सांत्वन केले आणि मला भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन (१) सांगितले की, 'श्रीगुरूंचे दर्शन घेऊन त्यांचे पादतीर्थ पतीच्या शवावर शिंपून मग तू सहगमन कर.' ते साधू कोण होते? आणि त्या रुद्राक्षांचा तसेच तीर्थाचा काय महिमा आहे?२. श्रीगुरू म्हणाले, 'हे बाळे, मीच दुसऱ्या रूपाने तुझ्या भक्तीची परीक्षा पाहिली. हे भाग्यवती साध्वी, तू खरेच धन्य आहेस! रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा असा आहे.'३.

**तन्माहात्म्यं कोऽत्र वक्ति भूषेशस्यामृतत्वदा । नृणामेकादिवक्त्राक्षा गङ्गास्नानादिपुण्यदाः ।।४।।**
**वराः स्युर्धातुरत्नाढ्याः शिव एव सहस्रधृक् । नाक्षैर्विना पुण्यलब्धिः पापनाशोऽक्षधारणात् ।।५।।**
**ईशनामाक्षभस्माढ्यो दुर्धरो मरुतामपि । जपेऽक्षाः प्राज्यफलदा ना भस्माक्षैर्विना पशुः ।।६।।**
**दन्ताभ्राब्ध्यर्कनृपभू-क्ष्मार्काष्टाशोन्मिताक्षतः । कण्ठकश्रुतिदोश्चूडा-दृक्करोरांसि भूषयेत् ।।७।।**

तन्+माहात्म्यं अत्र कः वक्ति? ईशस्य अमृतत्वदा भूषा। नृणां एकादि+वक्त्र+अक्षाः गङ्गा+स्नान+आदि पुण्यदाः।४। धातु+रत्न+आढ्याः वराः स्युः। सहस्रधृक् शिव एव। अक्षैः विना पुण्य+लब्धिः न। अक्ष+धारणात् पापनाशः।५। ईश+नाम+अक्ष+भस्म+आढ्यः मरुतां अपि दुर्धरः। जपे अक्षाः प्राज्य+फलदाः। भस्म+अक्षैः विना ना पशुः।६। दन्त+अभ्र+अब्धि+अर्क+नृप+भू+क्ष्मा+अर्क+अष्टाशोन्मित अक्षतः कण्ठ+क+श्रुति+दोः+चूडा+दृक्+कर+ऊर+अंसि भूषयेत्।७।

भगवान शंकरही ज्या रुद्राक्षांना भूषण म्हणून धारण करतात अशा मोक्षप्रद रुद्राक्षांचे माहात्म्य कोणाला बरे सांगता येईल? एकमुखी, पंचमुखी, एकादशमुखी, चतुर्दशमुखी इत्यादि प्रकारचे रुद्राक्ष गंगास्नानादिकांचे पुण्य देतात.४. सुवर्णादि धातूंनी किंवा रत्नांनी मढविलेले रुद्राक्ष उत्तम होत! एक हजार रुद्राक्ष धारण करणारा पुरुष शिवसदृश होतो. रुद्राक्ष धारण न करता कुठलेही पुण्य घडत नाही. केवळ रुद्राक्ष घातल्याने पापांचा क्षय होतो.५. मुखांत शिवनाम, शरीरावर रुद्राक्ष आणि अगावर भस्म धारण करणारा देवांनासुद्धा अजेय आहे. रुद्राक्षाच्या माळेने जप केल्यास अनंत फळ मिळते. भस्म आणि अक्ष रहित पुरुषही पशूसमानच होय.६. ३२ (*दंत*) रुद्राक्ष गळ्यांत, २४ (*अभ्राब्धि*) मस्तकावर, १२ (*अर्क*) कानांवर, १६ (*नृप*) बाहूंवर, १ (*भू*) शेंडीला, १ (*क्ष्मा*) डोळ्यांच्या मधे - भ्रूमध्यावर डोक्यावरून दोऱ्याने बांधून सोडलेला, १२ (*अर्क*) हातांवर आणि एकशे आठ रुद्राक्षांची माळ छातीवर याप्रमाणे धारण करावेत.७.

**काश्मीरे भद्रसेनस्य सुतस्तन्मन्त्रिणोऽप्युभौ । भूषां मत्वाश्मवत्स्वक्षान् बाल्येऽपि दधतुर्मुदा ॥८॥**
**शाक्त्यो राजाग्रहात्प्राह तद्धेतुं शृणु भूपते । नन्दिग्रामे पुरा तन्वी वारमुख्येन्दुभा सती ॥९॥**
**गजाश्वधनदाराढ्या धर्मज्ञा दानतत्परा । तन्नाट्यमण्डपे त्वेतौ साक्षौ मर्कटकुक्कुटौ ॥१०॥**
**शिवोऽस्या वैश्यरूपेण पातिव्रत्यं परीक्षितुम् । धृत्वाप कङ्कणं लिङ्गं भास्वद्वेश्याऽब्रवीत्सखीम् ॥११॥**

काश्मीरे भद्रसेनस्य सुतः, तत्+मंत्रिणः अपि, उभौ भूषां अश्मवत् मत्वा बाल्ये अपि सु+अक्षान् मुदा दधतुः।८। शाक्त्यः राज+आग्रहात् तत् हेतुं प्राह। (हे) भूपते, पुरा नन्दिग्रामे इन्दु+भा सती वारमुख्या (अभूत्)।९। (सा) गज+अश्व+धन+दारा+आढ्या धर्मज्ञा, दानतत्परा। तत् नाट्य+मंडपे तु एतौ स+अक्षौ मर्कट+कुक्कुटौ।१०। शिवः अस्य पातिव्रत्यं परीक्षितुं वैश्यरूपेण कङ्कणं (च) भास्वत् लिङ्गं धृत्वा आप। वेश्या सखीं अब्रवीत्।११।

रुद्राक्षमाहात्म्याची कथा सांगत आहेत. काश्मीरचा राजा भद्रसेन याचा मुलगा तसेच त्याच्या मंत्र्याचाही मुलगा ह्या दोघांनाही लहानपणापासून अलंकारांची नावड होती. ते त्यांना दगडासारखे वाटायचे. मात्र चांगले चांगले रुद्राक्ष मिळवून ते मोठ्या आवडीने धारण करीत.८. भद्रसेन राजाकडे एकदा पराशर ऋषी आले. राजाने वारंवार आग्रह केल्याने त्यांनी त्याला त्या बालकांच्या ह्या जगावेगळ्या वर्तनाचे कारण सांगितले. ते म्हणाले, 'पूर्वी नन्दिग्राम नावाच्या गावी एक सद्वर्तनी वेश्या राहत होती.९. ती हत्ती, घोडे, पैसा दास, दासी इत्यादींनी संपन्न असून धर्म जाणणारी, त्याप्रमाणे वागणारी आणि दानतत्पर होती. तिच्या रंगमहालांत तिने पाळलेले हे दोघे माकड आणि कोंबडा रुद्राक्षांनी सजविलेले होते.१०. ती वेश्या असूनही स्वतःला पतिव्रता मानत असे; आणि पातिव्रत्यधर्माचे पालन करीत असे. एकदा तिच्या पातिव्रत्याची परीक्षा पाहण्यासाठी भगवान शंकर एका व्यापाऱ्याचे रूप घेऊन हातांत कङ्कण आणि तेजस्वी शिवलिंग धारण करून तिथे आले. त्यांना घरापुढून जाताना पाहून वेश्या आपल्या सखीला म्हणाली.११.

**परिपृच्छैनमर्घाच्चेद् रत्या वा दास्यति त्र्यहम् । साध्वीत्वेन वधूर्भूत्वा रमयाम्यस्मि पद्मिनी ।।१२।।**
**श्रुत्वोचे स तथा पृष्टं स्वैरिण्यां सत्यता कुतः । युष्माकं कुलधर्मस्तु व्यभिचारो हि केवलम् ।।१३।।**

**।। वेश्योवाच ।।**

**न स्वैरिणीयं साध्व्येव लिङ्गं तत्र प्रमा खलु । अहं त्र्यहं सतीत्वेन भजे त्वां सर्वभावतः ।।१४।।**

**।। वैश्य उवाच ।।**

**गृहाणेदं पुष्पवन्तौ साक्षिणावत्र मेऽसुवत् । स्ववाक्यं दृढभक्त्यैव विचारय पुनः पुनः ।।१५।।**

'एनं परिपृच्छ अर्घात् रत्या वा (इदं लिङ्गं) दास्यति चेत् अहं त्रि+अहं तस्य साध्वीत्वेन वधूः भूत्वा रमयामि। पद्मिनी अस्मि।'१२। तथा पृष्टं श्रुत्वा सः ऊचे, 'स्वैरिण्यां सत्यता कुतः? युष्माकं कुलधर्मः तु केवलं व्यभिचारः।'।१३। वेश्या उवाच। 'इयं न स्वैरिणी, साध्वी एव। तत्र लिङ्गं प्रमा खलु। अहं त्रि+अहं त्वां सर्वभावतः सतीत्वेन भजे।'१४। वैश्य उवाच, 'इदं मे असुवत् गृहाण। अत्र पुष्पवन्तौ साक्षिणः। स्ववाक्यं दृढ+भक्त्या एव पुनः पुनः विचारय।'१५।

'या व्यापाऱ्याला विचारा की त्याचे ते शिवलिंग तो विकत किंवा संभोगाच्या मोबदल्यांत देईल कां? तसे असेल तर मी तीन दिवस त्याची पत्नी होईन आणि पातिव्रत्याने त्याला सुखवीन. मी पद्मिनी आहे.' (*पद्मिनी* म्हणजे कामशास्त्रानुसार उत्तम स्त्री.)१२.

त्या व्यापाऱ्याला तसे विचारले असता तो म्हणाला, 'तुम्हा स्वैराचारी वेश्यांचे बोलणे कसे खरे मानायचे? व्यभिचार हाच तर तुमचा कुळाचार आहे.'१३. ती वेश्या म्हणाली की, 'मी स्वैरिणी नसून खरोखर साध्वीच आहे. या लिंगाची भाक घेऊन सांगते की मी तीन दिवसपर्यंत तुमची एकनिष्ठ पत्नी म्हणून राहीन.'१४. तो वैश्य म्हणाला, 'ठीक आहे तर! हे माझे प्राणप्रिय लिंग सूर्य आणि चंद्रांना साक्षी ठेवून घे. आपल्या वचनावर दृढ भक्तीने वारंवार विचार कर!'१५.

**इत्युक्त्वा तत्करे बध्वा कङ्कणं लिङ्गमर्पयत् । साध्वीत्वेनापि सा भेजे लिङ्गं संस्थाप्य मण्डपे ।।१६।।**
**सलिङ्गो मण्डपो दग्धोऽग्निनाकस्माद्रतिक्षणे । सकीशकुक्कुटो वैश्यो जुहावाग्नौ तनुं तदा ।।१७।।**
**वेश्याऽपि भर्तृनाशार्ता कुलाचारविरुद्धताम् । मा भजेति निषिद्धाऽपि स्वैः सिद्धानुगमेऽभवत् ।।१८।।**
**दत्वा दानानि नत्वार्कं ध्यात्वेशं वह्निमाविशत् । प्रादुर्भूतस्तदा त्र्यक्षः पञ्चास्यः प्राह पङ्क्तिदोः ।।१९।।**
**मायामुद्भाव्य ते सर्वं मयेशेन परीक्षितम् । वारमुख्यापि साध्वी त्वं प्रीतोऽस्मि वरयेप्सितम् ।।२०।।**

इति उक्त्वा तत्+करे कङ्कणं बध्वा लिङ्गं अर्पयत्। सा अपि लिङ्गं मण्डपे संस्थाप्य (तं) साध्वीत्वेन भेजे।१६। रतिक्षणे अकस्मात् स+कीश+कुक्कुटः सलिङ्गः मंडपः अग्निना दग्धः। तदा वैश्यः अग्नौ तनुं जुहौ।१७। वेश्या अपि भर्तृ+नाश+आर्ता, स्वैः 'कुलाचार+विरुद्धतां मा भज' इति निषिद्धा अपि अनुगमे सिद्धा अभवत्।१८। दानानि दत्वा, अर्कं नत्वा, ईशं ध्यात्वा (सा) वह्निं आविशत्। तदा त्रि+अक्षः पञ्च+आस्यः पङ्क्ति+दोः प्रादुर्भूतः प्राह।१९। मया ईशेन मायां उद्भाव्य ते सर्वं परीक्षितम्। वारमुख्या अपि त्वं साध्वी। प्रीतः अस्मि। ईप्सितं वरय।२०।

असे बोलून त्याने तिच्या हातांत कङ्कण बांधून ते लिंग तिला दिले. तिनेसुद्धा ते लिंग मंडपांत ठेवले आणि त्याच्या बरोबर पत्नीधर्माने अंतर्गृहात गेली.१६. संभोगाच्या वेळी अचानक त्या मंडपाला आग लागली आणि तिथे ठेवलेले ते लिंग आणि ते माकड आणि कोंबडाही जळून भस्म झाले. ते पाहून त्या वैश्यानेही त्या अग्नीत आपले शरीर अर्पण केले.१७. पतीच्या मृत्यूने तळमळणारी ती वेश्याही पतीबरोबर सहगमन करण्यास निघाली. तिच्या स्वकीयांनी तिला खूप समजावले की 'आपल्या कुलधर्माच्या विरुद्ध असलेले कर्म तू करू नकोस.' पण तिने कुणाचेही ऐकले नाही.१८. यथाविधी दाने आणि वाणे देऊन, सूर्यनारायणाला नमस्कार करून भगवान शंकरांचे ध्यान करीत तिने अग्नीत प्रवेश केला. त्या वेळी तीन नेत्र, पाच मुखे आणि दहा भुजा असलेले भगवान शिव तेथे प्रकटले आणि म्हणाले.१९. 'मीच मायेने हे सर्व दाखवून तुझे धर्म, धैर्य आदींची परीक्षा पाहिली. तू वेश्या असलीस तरी खरोखर साध्वीच आहेस. मी प्रसन्न झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे.'२०.

**जैह्व्यौपस्थ्यं सुखं क्वापि न काङ्क्षे मे स्वकैः समम् । सायुज्यं तेऽर्पयेत्यूचे सा शिवोऽपि तथाऽकरोत ।।२१।।**
**तौ कीशकुक्कुटावेतौ पूर्वसंस्कारकारणात् । एतौ स्तोऽक्षप्रियौ शैवौ मताश्मसमभूषणौ ।।२२।।**
**तच्छ्रुत्वा भावि मे सूनोर्मुने शंसेति पृच्छते । राज्ञे तस्य मृतिर्नूनं सप्ताहादिति सोऽब्रवीत् ।।२३।।**
**मुहू राज्ञातिखिन्नेन प्रणतेनार्थितोऽब्रवीत् । पराशरऋषिर्मा भी राजन् रुद्रोऽस्ति तारकः ।।२४।।**
**स्रष्टा सृष्टौ जगद्वृद्ध्यै धर्माधर्मौ तयोः पती । इन्द्रान्तकौ तौ स्वरधो-नेतारौ धन्यपापिनाम् ।।२५।।**

'जैह्व्य+औपस्थ्यं सुखं क्व अपि न कांक्षे। मे स्वकैः समं ते सायुज्यं अर्पय,' इति सा ऊचे। शिवः अपि तथा अकरोत्।२१। एतौ तौ कीश+कुक्कुटौ पूर्व+संस्कार+कारणात् अक्षप्रियौ मत+अश्म+सम+भूषणौ शैवौ स्तः।२२। तत् श्रुत्वा, (हे) मुने, मे सूनोः भावि शंस इति पृच्छते राज्ञे, तस्य नूनं सप्ताहात् मृतिः इति सः अब्रवीत्।२३। मुहु अति+खिन्नेन प्रणतेन राज्ञा अर्थितः पराशरऋषिः अब्रवीत्। '(हे) राजन्, मा भीः। रुद्रः तारकः अस्ति।२४। स्रष्टा जगद्+वृद्ध्यै धर्म+अधर्मौ सृष्टौ। तयोः पती इन्द्र+अन्तकौ। तौ धन्य+पापिनां स्वः+अधो+नेतारौ।२५।

'जीभ आणि लिंग इत्यादींपासून होणाऱ्या ऐंद्रिय सुखाची, मग ते ऐहिक असो की पारलौकिक, मला मुळीच इच्छा नाही. मला माझ्या स्वकीयांसह आपले सायुज्य द्या,' असे ती वेश्या म्हणाली. भगवान शंकरांनी त्याचप्रमाणे तिला सपरिवार सायुज्य मुक्ती दिली.२१. हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा दोघे, तेच मंडपांत जळून गेलेले मर्कट आणि कुक्कुट आहेत. पूर्वजन्मीच्या संस्कारामुळे हे रुद्राक्षांची आवड असलेले आणि रत्नालंकारांना पाषाणासारखे तुच्छ मानणारे शिवभक्त झाले आहेत.'२२. ते आपल्या मुलाचे पूर्ववृत्त ऐकून राजाने विचारले की, 'ऋषिमहाराज, माझ्या मुलाचे भविष्य सांगा.' तेव्हां पराशर मुनींनी उत्तर दिले की, 'तुझ्या मुलाचा अवघ्या सात दिवसांनी मृत्यू होईल.'२३. ते ऐकून अत्यंत दुःखी झालेल्या राजाने वारंवार नमस्कार करून ह्या आपल्या मुलाच्या प्राणांसाठी प्रार्थना केली. त्यावर पराशर ऋषींनी त्याला धीर देत सांगितले, 'राजा! भिऊ नकोस. रुद्राध्याय तारक आहे.'२४. ब्रह्मदेवाने जगताच्या विस्तारासाठी धर्म आणि अधर्म निर्माण केले. धर्माचा पती इंद्र आणि अधर्माचा पती यम, हे दोघे अनुक्रमे पुण्यवान् आणि पापी लोकांना स्वर्गाला आणि नरकाला घेऊन जातात.२५.

**यमसारथयः काम-मुखा नानाघहेतवः । तत्सारथ्याद्यमो लोकान् पापान्क्षिपति दुर्गतौ ।।२६।।**
**बुद्धीन्द्रियमनःसंस्था अमी कामादयोऽबलाः । भीरून्निघ्नन्ति यमित-गोहृद्धीनामगोचराः ।।२७।।**
**वेदान्स्रष्टाऽसृजत्तत्र दक्षास्योत्थयजुःश्रुतेः । महारुद्रोऽघहृल्लब्धो मुनिभिः प्रसृतस्ततः ।।२८।।**

काममुखा यमसारथयः नाना+अघ+हेतवः। तत्+सारथ्यात् यमः पापान् लोकान् दुर्गतौ क्षिपति।२६। बुद्धि+इंद्रिय+मनः+संस्था अमी कामादयः अबलाः भीरून् निघ्नन्ति। यमित+गो+हृत्+धीनां अगोचराः।२७। स्रष्टा वेदान् असृजत्। तत्र दक्ष+आस्य+उत्थ+यजुः+श्रुतेः मुनिभिः अघहृत् महारुद्रः लब्धः। ततः प्रसृतः।२८।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ हे यमाचे सहायक आहेत. हेच नानाविध पापांचे मूळ आहेत. त्यांच्या साह्याने यम पापी लोकांना नरकात टाकतो. 'माणसाला पापाला प्रवृत्त करणारे कोण आहेत?' या अर्जुनाच्या प्रश्नाला 'रजोगुणापासून उद्भवणारे हे महापापी आणि खादाड काम आणि क्रोधच वैरी आहेत.' असे भगवंतांनी उत्तर दिले आहे (*काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।* भ.गीता ३:३७).२६. हे कामादि यमाचे सेवक बुद्धी, इंद्रिये आणि मन यांच्या आश्रयाने राहतात (*इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।* भ.गीता ३:४०). तसे ते निर्बळच आहेत; पण भित्र्या लोकांचा घात करतात. मात्र इंद्रिये, मन आणि बुद्धी यांच्यावर नियंत्रण ठेवणाऱ्यांच्या ते वाऱ्यालाही उभे राहत नाहीत. कठोपनिषदांत (१:३:१०-११) सांगितल्याप्रमाणे इंद्रियांपेक्षा विषय श्रेष्ठ आहेत. विषयांहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहेत. आत्मा सर्वांहून वर असल्याने इंद्रियादींचे नियमन करणाऱ्या आत्मसाधकांना कामादींचे दर्शनही होत नाही हे उघडच आहे.२७. श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितल्याप्रमाणे (६:१८) ईश्वराने वेद निर्माण केले. ब्रह्मदेवाच्या उजव्या मुखापासून यजुर्वेदाची उत्पत्ती झाली. त्याच्यातून ऋषीमुनींना पापनाशक अशा महान् रुद्राध्यायाची प्राप्ती झाली. ती त्यांनी शिष्य-प्रशिष्यपरंपरेने प्रसृत केली.२८.

**विप्रा यत्र पठन्त्येतं कामाद्याः सकला न तम् । देशं शेकुरपि द्रष्टुं याम्यं शून्यमभूत्पुरम् ।।२९।।**
**यमः शशंस तद्धात्रे स्वपन्तिष्ठन्व्रजन्कुधीः । मत्तोऽभक्तिर्जपति चेत्स पापी शाधि तं भृशम् ।।३०।।**
**तद्भिन्नान्जापकान् रुग्णान्मा प्रेक्ष मृतिगानपि । श्रीविदारोग्यादिभाजस्त इत्याह यमं विधिः ।।३१।।**
**तस्मान्मृत्युञ्जयस्त्राता मा भीः सद्ब्रह्मतः शिवे । अतिरुद्राभिषेकात्स भवेद्भूपायुतायुरित् ।।३२।।**

यत्र विप्रा एतं पठन्ति तं देशं कामाद्याः सकलाः द्रष्टुं अपि न शेकुः। याम्यं पुरं शून्यं अभूत्।२९। यमः तत् धात्रे शशंस। (स आह) 'स्वपन् तिष्ठन्, व्रजन्, कुधीः मत्तः अभक्तिः जपति चेत् सः पापी। तं भृशं शाधि।'३०। तद्+भिन्नान् जापकान् रुग्णान्, मृतिगान् अपि मा प्रेक्ष। ते श्री+वित्+आरोग्य+आदि+भाजः, इति विधिः यमं आह।३१। तस्मात् मृत्युञ्जयः त्राता, मा भीः। (हे)भूप, सद्+ब्रह्मतः शिवे अतिरुद्राभिषेकात् सः अयुत+आयुः भवेत्।३२।

जिथे ब्राह्मण या रुद्राध्यायाचे पठण करीत त्या देशाकडे कामादि सर्व पाहूही शकले नाहीत. अर्थात् यमपुरीतील सर्व नरक ओस पडले.२९. यमाने ही गोष्ट ब्रह्मदेवांना सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'जे कुणी ह्या रुद्राध्यायचा पाठ झोपून, उभ्याने, चालत, लोभाविष्ट बुद्धीने किंवा माझ्या भक्तीविना करतील ते पापी आहेत. त्यांना तू कठोर शासन कर.'३०.

'वर सांगितलेले सोडून इतर जे जापक असतील, ते जरी आजारी, अगदी मरायला टेकलेले असले तरी त्यांच्याकडे पाहूसुद्धा नकोस. त्यांना संपत्ती, विद्या, आरोग्य इत्यादींची प्राप्ती होईल.' याप्रमाणे ब्रह्मदेवांनी यमाला आज्ञा केली.३१. पराशर ऋषी सांगत आहेत, अशा रीतीने मृत्यूला जिंकणारा रुद्र तारणारा आहे, भिऊ नकोस. राजा, चांगल्या ब्राह्मणांकडून शंकराला अतिरुद्राभिषेक केल्यावर हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा ह्या दोघांचेही आयुष्य दहा हजार वर्षे होईल.३२.

**तच्छुत्वा द्राक्समाहूय सद्विप्रानृष्यनुज्ञया । राजानुष्ठानमारेभे श्रद्धाभक्त्या यथाविधि ।।३३।।**
**पाशदण्डधराः प्राप्ता सप्तमेऽह्नि यमानुगाः । गूढाङ्गा मूर्छितः पुत्रस्तदा तदुपरि द्विजैः ।।३४।।**
**प्रक्षिप्तरौद्राम्बुतीर्थ-मन्त्रिताक्षतसम्भवैः । रौद्रैर्दूताः पराभूता जग्मुस्तेऽथोत्थितः सुतः ।।३५।।**
**प्रीतो राजा तदा विप्रान् भोजयित्वाभ्यतोषयत । सभां विरच्योपवेश्य स्वासने शाक्त्यमाभजत् ।।३६।।**
**रणद्वीणो हरिं गायन्तत्राप्तो नारदो नृपः । तं प्रत्युद्गम्य सम्पूज्य लोकोदन्तमपृच्छत ।।३७।।**

तत् श्रुत्वा राजा द्राक् ऋषि+अनुज्ञया विप्रान् समाहूय श्रद्धा+भक्त्या यथाविधि अनुष्ठानं आरेभे।३३। सप्तमे अह्नि पाश+दण्ड+धराः गूढ+अङ्गाः यम+अनुगाः प्राप्ता। तदा पुत्रः मूर्छितः। तत् उपरि द्विजैः।३४। प्रक्षिप्त+रौद्र+अम्बु+तीर्थ+मंत्रित+अक्षत+सम्भवैः रौद्रैः दूताः पराभूताः। ते जग्मुः। अथ सुतः उत्थितः।३५। प्रीतः राजा तदा विप्रान् भोजयित्वा अभि+अतोषयत्। सभां विरच्य शाक्त्यं स्वासने उपवेश्य आभजत्।३६। तत्र रणत्+वीणः नारदः हरिं गायन् आप्तः। नृपः तं प्रति उद्गम्य सम्पूज्य लोक+उदन्तं अपृच्छत।३७।

मुनिवरांचे बोलणे ऐकून राजाने त्यांच्याच अनुज्ञेने लगेच ब्राह्मणांना पाचारण केले. आणि श्रद्धेने व भक्तीपूर्वक यथाशास्त्र अतिरुद्राच्या अनुष्ठानाला प्रारंभ केला.३३. सातव्या दिवशी पाश आणि दंड धारण केलेले यमदूत अदृश्यतया आले. तेव्हां राजपुत्र मूर्छित झाला. त्याच्यावर ब्राह्मणांनी रुद्राभिषेकाच्या पाण्याचे तीर्थ आणि अक्षता टाकल्या. त्यांपासून उद्भवलेल्या रुद्रदूतांनी यमदूतांचा पराभव केला आणि ते यमदूत निघून गेले. मग तो राजपुत्र उठून बसला.३४-३५.

प्रमुदित राजाने विप्रांना भोजनादि देऊन दक्षिणादींनी त्यांचा सत्कार केला. मग त्याने राज्यसभा भरवून आपल्या उच्च आसनावर पराशर ऋषींना बसवून त्यांची पूजा केली.३६. इतक्यांत आपल्या वीणेचा झंकार करीत आणि हरिनामाचा गजर करीत नारद तिथे आले. राजाने सामोरे जाऊन त्यांचा सत्कार केला आणि त्यांना राजाने स्वर्गलोकाची वार्ता विचारली.३७.

**स प्राहात्र महामृत्युस् त्वत्पुत्रं हर्तुमागतः । शिवदूतैः सदूतः स पराभूतो यमं ययौ ।।३८।।**
**यमोऽपि तैः सहैत्यैशान् दूतान्प्राहेश्वराज्ञया । नियतं कर्तुमुद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः ।।३९।।**
**ऊचुस्तेऽदश्चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थो भवान्तक । स पट्टे द्वादशाब्देऽल्पं मृत्युं तीर्त्वायुतायुरित् ।।४०।।**
**भविष्यतीति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान्क्षमापयत् । दृष्टं मयेदं ते पुत्रस्त्रातः शाक्त्येन भूपते ।।४१।।**
**इत्युक्त्वा नारदोऽगात्स्वराशीर्भिरभिनन्द्य तौ । शाक्त्योऽप्यगात्स्वधामेयान्तीर्थाक्षमहिमा सति ।।४२।।**

स प्राह। 'अत्र महामृत्युः त्वत्+पुत्रं हर्तुं आगतः। शिव+दूतैः सदूतः पराभूतः सः यमं ययौ।३८। यमः अपि तैः सह एत्य ऐशान् दूतान् प्राह। 'ईश्वर+आज्ञया नियतं कर्तुं उद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः?'३९। ते ऊचुः। '(हे) अन्तक, अदः चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थः भव।' स पट्टे द्वादश+अब्दे अल्पं मृत्युं तीर्त्वा इत् अयुत+आयुः।४०। भविष्यति इति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान् क्षमापयत्। '(हे) भूपते इदं मया दृष्टम्। ते पुत्रः शाक्त्येन त्रातः।'४१। इति उक्त्वा नारदः तौ आशीभिः अभिनन्द्य स्वः अगात्। शाक्त्यः अपि स्वधाम अगात्। (हे) सति, इयान् तीर्थ+अक्ष+महिमा।४२।

नारदमुनी म्हणाले, 'अरे राजा, आत्ता इथे महामृत्यू तुझ्या मुलाला घेऊन जायला आला होता. शिवदूतांनी त्याचा आणि त्याच्या दूतांचा पराभव केल्यावर तो यमराजाकडे गेला.३८. यमाने आपल्या दूतांचे म्हणणे ऐकले आणि तो शिवदूतांना येऊन म्हणाला, 'ईश्वराच्या आज्ञेने नेमून दिलेले कार्य मी करीत असता तुम्ही विघ्न करता हे योग्य नाही!'३९. ते शिवदूत त्याला म्हणाले, 'यमराज, ह्याची तुम्ही चित्रगुप्ताकडून खातरजमा करा ना!' तेव्हां यमधर्माने तुझ्या पुत्राचे खाते पाहिले. त्यांत असे लिहिले होते की, 'बाराव्या वर्षी अल्पमृत्यूपासून तरून तिथून पुढे तो दहा हजार वर्षे जगेल.' ते पाहून गोंधळात पडलेल्या यमाने शैवदूतांची क्षमा मागीतली. नारदमुनी पुढे म्हणाले, 'हे राजा, मी हे स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. तुझ्या मुलाला पराशरमुनींनीच जीवदान दिले आहे!'४०-४१. याप्रमाणे बोलून आणि त्या कुमारांचे आशीर्वादपूर्व अभिनंदन करून नारदमुनी स्वर्गाला गेले. पराशरही आपल्या घरी गेले. श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, हे सती, असा आहे रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा!४२.

**|| सावित्र्युवाच ||**

**यत्त्वद्दृग्गोचरा साक्षाज्जाता धन्यतमा गुरो । उपादिश मनुं मे ते पादाब्जस्मृतिहेतवे ।।४३।।**

**|| श्रीगुरुरुवाच ||**

**नोपदेश्यो मनुः स्त्रीणां पतिभक्तिस्तु तारका । दत्तोऽप्यनुपयुक्तः स्याद्दातुर्हानिश्च शुक्रवत् ।।४४।।**
**शृणु साध्वि पुरा देव-दैत्ययुद्धमभून्महत् । काव्यो मन्त्रजपाद्वज्रि-हतान्दैत्यानजीवयत् ।।४५।।**
**गत्वेन्द्रः शरणं शम्भुं तच्छशंस शिवेन तु । आनयित्वा कविर्लीढः सोऽपि मूत्राद्बहिर्गतः ।।४६।।**

सावित्री उवाच। '(हे) गुरो, यत् त्वत्+दृक्+गोचरा जाता धन्यतमा (अस्मि)। ते पाद+अब्ज+स्मृति+हेतवे मे मनुं उपादिश।'४३। श्रीगुरुः उवाच। 'स्त्रीणां पतिभक्तिः तु तारका, मनुः न उपदेश्यः, दत्तः अपि अनुपयुक्तः स्यात्। शुक्रवत् दातुः हानिः।'४४। '(हे) साध्वि, शृणु। पुरा महत् देव+दैत्य+युद्धं अभूत्। काव्यः मन्त्रजपात् वज्रि+हतान् दैत्यान् अजीवयत्।४५। इन्द्रः शंभुं शरणं गत्वा तत् शशंस। शिवेन तु कविः आनयित्वा लीढः। सः अपि मूत्रात् बहिः गतः।'४६।

सावित्री म्हणाली, 'गुरुमहाराज, आपल्या कृपाकटाक्षाने मी खरोखर धन्यातिधन्य झाले आहे! आपल्या पदकमलांचे स्मरण मला राहावे यासाठी आपण मला मंत्राचा उपदेश करावा.'४३. श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतिभक्ती हाच तरणोपाय आहे. स्त्रियांना मंत्र देऊ नये. दिला तरी व्यर्थच होतो. शिवाय शुक्रासारखी मंत्र देणाऱ्याचीही हानी होते.'४४. हे सती ऐक. पूर्वी देव आणि दैत्य यांचे मोठे युद्ध झाले. इंद्राच्या वज्राने दैत्यांचा संहार होत असे. पण दैत्यांचे गुरू शुक्राचार्य संजीवनी मंत्राचा जप करून त्या दैत्यांना पुनः जिवंत करीत.४५. इन्द्राने भगवान् शंकरांना शरण जाऊन हे त्यांच्या कानांवर घातले. शंकरांनी शुक्राचार्यांना आणून गिळून टाकले. पण तो कांही काळ शंकरांच्या पोटात राहून नंतर मूत्रद्वारे बाहेर पडला. पूर्वी दैत्यगुरूंचे नांव भार्गव असे होते; पण शिवाच्या शुक्राशी (वीर्याशी) संबंध आल्याने त्याचे नाव शुक्र असे पडले. स्कंद पुराणाच्या प्रभास खंडांत ही कथा आहे.४६.

**दैत्यानेत्य पुनः शुक्रस्तान्मृतानप्यजीवयत् । त्रस्तस्तदेन्द्रो धीमन्नः पाहीति प्रार्थयद्गुरुम् ।।४७।।**
**स प्राह तन्मनौ व्याजाद्भ्रंशिते वो जयो ध्रुवः । त्रिलोककण्टकोत्कर्षान् मन्त्रसारहृतिर्वरम् ।।४८।।**
**इत्युक्त्वा स कचं प्राह स्वसुतं गच्छ रे कविम् । विद्यार्थित्वेन तं तुष्ट्वा मन्त्रसारं तिरस्कुरु ।।४९।।**
**तं नत्वापि कचो गत्वा शुक्रं प्राहास्मि ते गुरो । शिष्यो मां प्रणतं शाधि पक्षित्वं मा निधा मयि ।।५०।।**
**एवमुक्तवतस्तस्य रूपसौन्दर्यमोहिता । शुक्रं प्रियात्मजोचेऽमुं शिष्यत्वेनोररीकुरु ।।५१।।**

शुक्रः पुनः दैत्यान् एत्य तान् मृतान् अपि अजीवयत्। तदा इन्द्रः त्रस्तः गुरुं धीमन् नः पाहि इति प्रार्थयत्।४७। स प्राह। 'तत्+मनौ व्याजात् भ्रंशिते (सति) वः जयः ध्रुवः। त्रिलोक+कंटक+उत्कर्षात् मंत्र+सार+हृतिः वरम्।'४८। इति उक्त्वा सः कचं प्राह। 'रे, कविं गच्छ। तं विद्यार्थित्वेन तुष्ट्वा मंत्रसारं तिरस्कुरु।'४९। तं नत्वा अपि कचः शुक्रं गत्वा प्राह। '(हे) गुरो, ते शिष्यः अस्मि। मां प्रणतं शाधि। मयि पक्षित्वं मा निधा।'५०। एवं उक्तवतः तस्य रूप+सौंदर्य+मोहिता प्रिया आत्मजा शुक्रं ऊचे। 'अमुं शिष्यत्वेन उरीकुरु।'५१।

शुक्राचार्य दैत्यांकडे परत आले आणि पुनः मृत दैत्यांना सजीव करू लागले. ह्यामुळे त्रासलेला इंद्र देवगुरू बृहस्पतींकडे गेला. आपण बुद्धिवंत आहांत, 'आमचे रक्षण करा' अशी त्याने प्रार्थना केली.४६. बृहस्पती म्हणाले, 'कांही तरी कपटाने त्या शुक्राचार्यांचा मंत्र भ्रष्ट करायला हवा. त्रैलोक्याला त्रासणाऱ्या या दैत्यांचा उत्कर्ष होण्यापेक्षा त्या मंत्राचे सारच घालवून टाकावे हे बरे!' दुर्जन वरचढ होऊ लागले तर त्यांच्या प्रतिकारासाठी कपटाचा आश्रय घेण्यांत दोष नाही, असा त्यांचा अभिप्राय.४८. असे इंद्राशी बोलून देवगुरू आपल्या पुत्राला - कचाला, म्हणाले, 'बाळा, तू शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांचे शिष्यत्व पत्कर. हर प्रकारे त्यांचे मन संतुष्टवून संधी साधून त्यांच्या मंत्राचा प्रभाव नष्ट कर.'४९. आपल्या पित्याला वंदन करून कच लगेच निघाला. शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांना नमस्कार करून म्हणाला, 'गुरुमहाराज, मी आपला शिष्य होऊं इच्छितो. नम्रपणे आपल्याला शरण आलों आहे. तरी आपण माझा अंगीकार करा. मी देवगुरूंचा पुत्र असलो तरी आपण दुजाभाव मनांत न ठेवतां माझे गुरु व्हा.'५०. कच शुक्राचार्यांशी असे बोलत असतांना, दैत्यगुरूंची एकुलती एक लाडकी कन्या देवयानी जवळच उभी होती. ती कचाच्या सुंदर रूपाने मोहित झाली आणि आपल्या पित्याला म्हणाली, 'बाबा, ह्याला शिष्य करून घ्या ना!'५१.

**तच्छ्रुत्वोशनसा सोऽपि तद्वात्सल्यादुरीकृतः । कचोऽपि सर्वभावेन शुक्रं गुरुमतोषयत् ।।५२।।**
**ज्ञात्वा तच्छाठ्यमसुराः समिदर्थं गतं वनम् । तं जघ्नुर्देवयान्याह शुक्रं नाप्तः कुतः प्रियः ।।५३।।**
**शुक्रोऽपि तं हतं ज्ञात्वा ध्यानान्मन्त्रप्रभावतः । जीवयित्वाऽऽनयद्गेहं कचं हृष्टाभवत्सुता ।।५४।।**
**मुहुर्दैत्या वने हत्वा हिंस्रेभ्यस्तत्पलं ददुः । तमदृष्ट्वैव शोचन्तीं कन्यामाश्वास्य भार्गवः ।।५५।।**
**ज्ञात्वा तं भक्षितं हिंस्रैस् तत्कुक्षेर्मन्त्रशक्तितः । कात्स्न्यान्निष्काश्य कृत्वैक्यं सजीवं पूर्ववद्व्यधात् ।।५६।।**

तत् श्रुत्वा उशनसा तत्+वात्सल्यात् सः अपि उरीकृतः। कचः अपि गुरुं शुक्रं सर्वभावेन अतोषयत्।५२। असुराः तत्+शाठ्यं ज्ञात्वा समिदर्थं वनं गतं तं जघ्नुः। देवयानी शुक्रं आह। 'प्रियः कुतः न आप्तः?'५३। शुक्रः अपि ध्यानात् तं हतं ज्ञात्वा, मंत्र+प्रभावातः जीवयित्वा कचं गेहं आनयत्। सुता हृष्टा अभवत्।५४। मुहुः दैत्याः (कचं) वने हत्वा तत्+पलं हिंस्रेभ्यः ददुः। तं अदृष्ट्वा शोचन्तीं कन्यां आश्वास्य भार्गवः।५५। तं हिंस्रैः भक्षितं ज्ञात्वा, मंत्र+शक्तितः तत्+कुक्षेः निष्काश्य ऐक्यं कृत्वा पूर्ववत् व्यधात्।५६।

तिचा आग्रह पाहून तिच्यावरील वात्सल्याने शुक्राचार्यांनी कचाला, तो देवगुरूंचा पुत्र असूनही शिष्य करून घेतले. कचानेही आपले गुरू शुक्राचार्यांची सर्व प्रकारे सेवा करून त्यांना प्रसन्न केले.५२. मात्र असुरांना हे कचाचे कपट लक्षात आले. त्यांनी एकदा संधी साधून कच समिधा आणायला वनात गेलेला असताना त्याला गाठून ठार केले. बराच उशीर होऊनही कच घरी न परतल्याने देवयानी अस्वस्थ झाली आणि आपल्या वडिलांना म्हणाली, 'कच अजून कसा आला नाही?' ५३. शुक्राचार्यांनी ध्यानाने कचाची हत्या झाल्याचे जाणले आणि संजीवनी मंत्राच्या प्रभावाने त्याला जिवंत करून घरी परत आणले. देवयानीला त्यामुळे आनंद वाटला.५४. दैत्यांनी पुन्हा कचाला ठार करून त्याचे मांस हिंस्र पशूंना खाऊ घातले. कच न दिसल्यामुळे शोक करणाऱ्या आपल्या मुलीला आश्वासित करून(५५) शुक्राचार्यांनी त्याला श्वापदांनी खाल्ल्याचे जाणले. मग त्याला त्या श्वापदांच्या पोटांतून पूर्णपणे काढले आणि एकत्र जोडून पुन्हा पहिल्याप्रमाणे जिवंत केले.५६.

**पुनर्दैत्याः कचं हुत्वा तद्भस्म मधुयोजितम् । ददुः शुक्राय प्रमादात् स पपौ दैत्यवत्सलः ।।५७।।**
**पुनः कन्यातिखिन्नाऽभूच्छुक्रो ज्ञात्वोदरस्थितम् । दैत्यान्छशाप ब्रह्मघ्नान् कन्यामाह स नाप्यते ।।५८।।**
**दैत्यैः क्षिप्तः स मत्कुक्षौ तदानयनतो हि मे । मृत्युर्भवेन्न को वेद दिव्यं मन्त्रं हि मां विना ।।५९।।**
**कन्योचे तात मे मन्त्रमुपादिश च जीवय । तं त्वां यदेष्यति मृतिर्जीवयामि सुमन्त्रतः ।।६०।।**
**नोचेत्प्राणांस्त्यजामीति निर्विण्णास्यै स मोहतः । दत्वा मन्त्रं जपित्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ ।।६१।।**

पुनः दैत्याः कचं हुत्वा तत्+भस्म मधु+योजितं शुक्राय ददुः। दैत्यवत्सलः सः प्रमादात् पपौ।५७। पुनः कन्या अति+खिन्ना अभूत्। शुक्रः (तं) उदर+स्थितं ज्ञात्वा ब्रह्मघ्नान् दैत्यान् शशाप। कन्यां आह, 'सः न आप्यते।५८। दैत्यैः सः मत्+कुक्षौ क्षिप्तः। तत्+आनयतः हि मे मृत्युः भवेत्। दिव्यं मंत्रं हि मां विना कः न वेद।'५८-५९। कन्या ऊचे। '(हे) तात, मे मंत्रं उपादिश च तं जीवय। यत् त्वां मृतिः एष्यति (अहं) सुमंत्रतः जीवयामि।६०। नो चेत् प्राणान् त्यजामि।' इति निर्विण्णा। सः अस्यै मोहतः मन्त्रं दत्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ।६१।

मग दैत्यांनी कचाला जाळून त्याचे भस्म केले आणि ते मधांत कालवून शुक्राला दिले. दैत्यांच्या वात्सल्याने शुक्राने फारशी चौकशी न करता ते पिऊनही टाकले.५७. त्या दिवशीसुद्धा कच आला नाही असे पाहून कन्या फारच खिन्न झाली. शुक्राचार्यांनी ध्यानाने पाहता तो आपल्याच पोटात असल्याचे त्यांना दिसून आले. तेव्हा दैत्यांनी केलेल्या ब्रह्महत्येने संतापून त्यांनी त्यांना शाप दिला आणि देवयानीला म्हणाले, 'तो आता कांही परत येणार नाही.५८. दैत्यांनी त्याला माझ्याच पोटात घातले आहे. त्याला आणले तर नक्कीच माझा मृत्यू होईल. आणि दिव्य संजीवनी मंत्र माझ्यावांचून कुणालाच येत नाही.'५९. देवयानी म्हणाली, 'बाबा! तो मंत्र मला शिकवा आणि कचाला जिवंत करा. तुम्हांला मृत्यू आल्यावर त्या संजीवनी मंत्राने मी तुम्हांला जिवंत करीन. अन्यथा मीच प्राणत्याग करीन!' असे कन्येचे निर्वाणीचे बोलणे ऐकून तिच्या ममतेने मोहित अशा शुक्राचार्यांनी मंत्राचा जप करून कचाला जिवंत केले आणि स्वतः मरण पावले.६०-६१.

**विदार्य जठरं प्राप्तं कचं दृष्ट्वा मृतं कविम् । मन्त्रेण जीवयामास तदाऽतेजाऽभवन्मनुः ।।६२।।**
**कृतकृत्यः कचो नत्वा गुरुं प्राह तदासुराः । घ्नन्ति मां तद्गृहं यास्ये मदर्थे भवतोऽप्यकम् ।।६३।।**
**सोऽपि गच्छेत्यादिदेश कन्योचे मत्पतिर्भव । मयैतदर्थमेव त्रिर्-जीवितोसि मृतोऽप्यहो ।।६४।।**
**कच ऊचे गुरोः कन्या स्वसाम्बास्वर्पणाच्च तत् । नोद्वाह्यातस्त्यजास्वर्ग्यं विरुद्धाग्रहमम्ब भोः ।।६५।।**
**सा विद्यां विस्मरेत्येनं शशापापि स तां नृपः । त्वां वरिष्यति मौर्ख्यात्ते नश्येन्मन्त्रो गुरोरिति ।।६६।।**

जठरं विदार्य प्राप्तं कचं दृष्ट्वा (देवयानि) मृतं कविं मन्त्रेण जीवयामास। तदा मनुः अतेजा अभवन्।६२। तदा कृतकृत्यः कचः गुरुं नत्वा प्राह। 'असुराः मां घ्नन्ति। तत् गृहं यास्ये। मत् अर्थे भवतः अपि अकम्।'६३। सः अपि 'गच्छ' इति आदिदेश। कन्या ऊचे, 'मत् पतिः भव। मया एतत् अर्थं एव त्रिः मृतः अपि जीवितः असि।'६४। कच ऊचे। 'गुरु+कन्या स्वसा। असु+अर्पणात् च अम्बा। तत् न उद्वाह्या। अतः भो अम्ब, अस्वर्ग्यं विरुद्ध+आग्रहं त्यज।'६५। सा एनं 'विद्या विस्मर' इति शशाप। सः तां, 'ते मौर्ख्यात् त्वां नृपः वरिष्यति। गुरोः मन्त्रः नश्येत्।' इति (शशाप)।६६।

आपल्या पित्याचे पोट फाडून कच बाहेर आलेला पाहताच देवयानीने मन्त्राने शुक्राचार्यांना जिवंत केले. मात्र त्यानंतर त्या मंत्राचे तेज लोप पावले.६२. तेव्हा आपला कार्यभाग साधलेला जाणून कचाने गुरू शुक्राचार्यांना वंदन केले आणि म्हणाला, 'हे दैत्य मला कांही जिवंत ठेवणार नाहीत. तेव्हा मी आपल्या घरी जातो. माझ्याकारणे आपल्यालाही खूप कष्ट झाले.'६३. शुक्राचार्यांनीही त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. तेव्हा देवयानी कचाला म्हणाली, 'तू माझा पती हो! याचसाठी तू मेलेला असताही तुला तीन वेळा मी जीवदान दिले.'६४. कच उत्तरला, 'तू गुरूंची कन्या असल्याने माझी बहीण लागतेस. मला जीवदान दिल्याने आता तू माझी माताच आहेस. तेव्हा आपला विवाह होऊ शकत नाही. तरी माते, हा अधःपातकारी शास्त्रविरुद्ध हट्ट तू सोड.'६५. तेव्हां तिने त्याला 'तू तुझी विद्या विसरशील!' असा शाप दिला. त्यानेही तिला उलट शाप दिला की, 'तुझ्या मूर्खपणाने तुझे लग्न राजाशी (क्षत्रियाशी) होईल आणि गुरुमहाराजांचा मंत्र नष्ट होईल.'६६.

**मन्त्रोऽतेजास्तदैवाभूच्छुक्रो दीनत्वमापतत् । स्त्रियै मन्त्रस्ततोऽदेयः कार्यं गुर्वाज्ञया व्रतम् ।।६७।।**

**।। सावित्र्युवाच ।।**

**भगवन्सद्गुरो मन्त्रो यर्ह्यग्राह्यो हि योषिताम् । तर्ह्येकं व्रतमाख्याहि तारकं ते स्मृतिप्रदम् ।।६८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सुलभं तारकं साध्वि सोमवारमहाव्रतम् । व्रतोत्तमं सुधामेष्ट-दं केऽप्यस्याधिकारिणः ।।६९।।**

'तदा एव मन्त्रः अतेजा अभूत्। शुक्रः दीनत्वं आपतत्। ततः स्त्रियै मन्त्रः अदेयः। गुरु+आज्ञया व्रतं कार्यम्।'६७। सावित्री उवाच। '(हे) सद्गुरु भगवन्, यर्हि योषितां मन्त्रः अग्राह्यः तर्हि एकं तारकं ते स्मृतिप्रदं व्रतं आख्याहि।'६८। श्रीगुरुः उवाच। '(हे) साध्वि, सोम+वार+महा+व्रतं व्रतोत्तमं सुलभं तारकं सुधाम+इष्टदम्। सर्वे अपि अस्य अधिकारिणः।६९।

**स्त्रियांना मंत्राचा अधिकार आहे का?** तत्काळ तो संजीवनी मंत्र निस्तेज झाला आणि शुक्राचार्यांना दीनत्व आले. एवढ्यासाठी स्त्रियांना मंत्र देऊ नये. पूर्वीच्या युगात गोधा, घोषा, विश्ववारा इत्यादि ब्रह्मज्ञानी स्त्रियांचा उल्लेख आहे. *घोषा गोधा विश्ववारा, अपालोपनिषन्निषत्। ब्रह्मजाया जहुर्नाम अगस्त्यस्य स्वसा दिती।।८४।। इन्द्राणी चेन्द्रमाता च सरमा रोमशोर्वशी। लोपामुद्रा च नद्यश्च यमो नारी च शाश्वती।।८५।। श्रीर्लक्ष्मी सर्पराज्ञा वाक्श्रद्धा मेधा च दक्षिणा। रात्रि सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरितः।।८६।।* (बृहत् देवता अ. २४) तथापि सांप्रत कलियुगात स्त्रियांना मंत्राचा अधिकार नाही हा विशेष आहे. यावर असा आक्षेप घेता येईल की, गीतेत (९:३२) स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हेसुद्धा परम गती पावतात असे म्हटले आहे. मंत्राचा जर त्यांना अधिकार नसेल तर त्यांना मोक्ष कसा मिळेल? याचे समाधान श्लोकाच्या अंतिम चरणांत दिले आहे. त्यांनी व्रत करावे; पण तेही गुरूंच्या आज्ञेने, आपल्या स्वतंत्र बुद्धीने नाही. वितानकर्मांत (वितान=अथर्ववेदाचे परिशिष्ट) मात्र स्त्रियांना मंत्रपाठाचा आणि श्रवणाचा अधिकार आहे.६७.

**सीमन्तिन्या यत्प्रभावान् नष्टोऽप्याप्तः पतिः शृणु । प्राक् चित्रवर्मार्यावर्ते राजा शूरो वशी कृती ।।७०।।**
**धीरूपशीललक्ष्माढ्यां पुत्रीं लेभेऽजसेवया । शान्त्याद्याढ्या सती भर्त्रायुताब्दं राज्यभोक्त्र्यसौ ।।७१।।**
**इत्यूचुर्गणकास्त्वेको बाल्ये वैधव्यमित्यपि । राजा हृष्टोऽपि खिन्नोऽभूद् ववृधे सा सितेन्दुवत् ।।७२।।**

यत् प्रभावात् सीमन्तिन्या नष्टः अपि पतिः आप्तः (तत्) शृणु। प्राक् आर्यावर्ते चित्रवर्मा वशी कृती राजा (अभूत्)।७०। (सः) अज+सेवया धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्यां पुत्रीं लेभे। गणकाः, असौ शान्ति+आदि+आढ्या सती भर्त्रा अयुत अब्दं राज्य+भोक्त्री इति ऊचुः। एको, 'बाल्ये वैधव्यं' इति अपि। राजा हृष्टः अपि खिन्नः अभूत्। सा सित+इन्दु+वत् ववृधे।७१-७२।

त्यावर सावित्रीने प्रार्थना केली, 'अहो सद्गुरू भगवान, जर स्त्रियांना मंत्र घेता नाही तर मग आपण मला एक असे तारक व्रत सांगा ज्यायोगे मला आपले स्मरण राहील.' वरील गीताश्लोकांत स्त्रियादिकांना मोक्षासाठी आपला व्यपाश्रय (आधार) आवश्यक असल्याचे प्रतिपादन आहे. म्हणून ही सती गुरुस्मरणाची याचना विशेषत्वाने करीत आहे.६८. श्रीगुरू म्हणाले, 'हे सती, सोमवार हे महाव्रत सर्व व्रतांत उत्तम व्रत आहे. ते सुलभ, तारक, प्रभावी आणि इष्टकामना पुरविणारे आहे. हे व्रत कुणालाही - धर्मबाह्य यवनादिकांना सोडून, सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्रिया इत्यादींना करता येते. उमा म्हणजे अध्यात्मविद्या किंवा पार्वतीमाता, तिच्यासह असलेला सोम म्हणजे भगवान शंकर. त्यांचा वार म्हणजे आनंदवर्धक दिवस तो सोमवार. हे नित्यही करता येते किंवा काम्यही आहे त्यामुळे त्याला महाव्रत म्हटले आहे.६९. ज्या व्रताच्या प्रभावाने सीमन्तिनीला आपला मरण पावलेला पतीसुद्धा परत मिळाला त्याची कथा ऐक. पूर्वी आर्यावर्तात चित्रवर्मा सामर्थ्यशाली आणि प्रतापी राजा होता.७०. त्या राजाला भगवान शंकरांच्या उपासनेच्या फलस्वरूप एक मुलगी झाली. ती बुद्धिमान, रूपवान्, शीलवान आणि उत्तम लक्षणांनी युक्त अशी होती. तिच्या जन्माच्या वेळेनुसार ज्योतिष्यांनी भाकित वर्तविले की, 'ही कन्या शांती, दया, क्षमा आदि गुणांनी युक्त अशी सती असून आपल्या पतीसह दहा हजार वर्षे राज्य करील.' राजाला आनंद वाटला; पण तेवढ्यात एक ज्योतिषी असेही म्हणाला की, 'ही बालपणीच विधवा होईल.' राजाच्या आनंदावर विरजण पडल्यासारखे झाले. पुढे ती कन्या शुक्लपक्षाच्या चंद्रासारखी वाढू लागली.७१-७२.

**सा द्वादशाब्दिका श्रुत्वा वैधव्यं भावि दुःखिता । नत्वैकदाप्तां मैत्रेयीं साऽवैधव्यं स्म याचते ।।७३।।**
**तां साब्रवीत्सोमवार-व्रतात् त्रातास्ति शंकरः । प्रतीन्दुवारं संसेव्यो गोहृत्कायैः सदाशिवः ।।७४।।**
**उपोष्य नक्तं भुक्त्वा वा भक्त्यास्मिन्न क्षणं स्वपेत् । नश्येत्प्राप्तापि भीस्त्यक्ते व्रते कुप्येत शंकरः ।।७५।।**

सा द्वादश+अब्दिका भावि वैधव्यं श्रुत्वा दुःखिता। सा एकदा आप्तां मैत्रेयीं नत्वा अवैधव्यं याचते स्म।७३। सा तां अब्रवीत्। 'सोमवार+व्रतात् शंकरः त्राता अस्ति। प्रति इन्दुवारं गो+हृत्+कायैः सदाशिवः (सदा शिवः) उपोष्य, नक्तं भुक्त्वा वा भक्त्या संसेव्यः। अस्मिन् न क्षणं (अपि) स्वपेत्। प्राप्ता अपि भी नश्येत्। व्रते त्यक्ते शंकरः कुप्येत।७४-७५।

ती बारा वर्षांची असताना आपण विधवा होणार असल्याचे भविष्य तिच्या कानांवर पडले. त्यामुळे ती दुःखित झाली. एकदा घरी आलेल्या मैत्रेयीला शरण जाऊन तिने अवैधव्याची याचना केली. **'आप्तां'** या शब्दाचा अर्थ आलेल्या असाही होतो किंवा हितोपदेश करणारी ब्रह्मज्ञानी साध्वी असाही होतो.७३. मैत्रेयीने तिला सांगितले, 'सोमवार व्रत करणाऱ्याचे भगवान शंकर रक्षण करतात. दर सोमवारी इंद्रिये, मन आणि देह यांनी (कायावाचामने) उपास करून किंवा रात्री उपास सोडून भक्तिभावाने सदाशिवाची सेवा करावी. त्या दिवशी क्षणभरही झोपू नये. किंवा स्वयंप्रकाश अपरोक्षरूप शिवाच्या चिंतनात किंचितसुद्धा प्रमाद करू नये. अगदी समोर आलेले संकटही नाश पावते. एकदा घेतलेले व्रत टाकले तर मात्र शंकरांचा कोप होतो'. व्रताचे सातत्य टिकावे म्हणून हे शासन सांगितले आहे.७४-७५.

**पापक्षयोऽस्याभिषेकात् साम्राज्यं पीठपूजनात् । गन्धादिदानात्सौभाग्यं सौगन्ध्यं धूपदानतः ।।७६।।**
**दीपात्कान्तिर्भोज्यदानाद्भुक्तिस्ताम्बूलतो रमा । नत्या पुमर्थो ऐश्वर्यं जपाद्ब्राह्मणभोजनात् ।।७७।।**
**सर्वतृप्तिः कोशवृद्धिर्होमाल्लभ्याखिलं स्तवात् । तद्व्रतं कुर्विति प्रोक्त्वा सागात्कन्याऽकरोद्व्रतम् ।।७८।।**
**भूयाद्भाव्येषा देयेति मत्वा चन्द्राङ्गदाय राट् । तां वरायानुरूपाय नलगोत्रभुवे ददौ ।।७९।।**
**गजाश्वदासराष्ट्रादि दत्वापि स्वपुरे मुदा । पुत्राभावात्स तं राजा मेने संस्थाप्य पुत्रवत् ।।८०।।**

अस्य अभिषेकात् पापक्षयः, पीठपूजनात् साम्राज्यं, गन्धादिदानात् सौभाग्यं, धूपदानात् सौगन्ध्यम्।७६। दीपात् कान्तिः, भोज्यदानात् भुक्तिः, ताम्बूलतो रमा, जपात् ऐश्वर्यं, ब्राह्मणभोजनात् सर्वतृप्तिः, होमात् कोशवृद्धिः, स्तवात् अखिलं लभ्य। तत् व्रतं कुरु इति प्रोक्त्वा सा अगात्। कन्या व्रतं अकरोत्।७७-७८। राट् 'भावि भूयात्, एषा देया' इति मत्वा तां अनुरूपाय वराय नल+गोत्र+भुवे चन्द्राङ्गदाय ददौ।७९। गज+अश्व+दास+राष्ट्र+आदि दत्वा अपि राजा पुत्र+अभावात् तं मुदा स्वपुरे संस्थाप्य पुत्रवत् मेने।८०।

आता सोमवारी केलेल्या शिवाच्या पूजनाची फळे सांगतात. शंकराला अभिषेक केल्याने पापक्षय होतो; पीठपूजनाने साम्राज्यप्राप्ती; सुगंधी पदार्थ अर्पण केल्याने सौभाग्य; धूप दिल्याने देह सुगंधी होतो; दीप दाखविल्याने शरीर तेजस्वी होते; नैवेद्य समर्पण केल्याने सर्व भोग मिळतात; विडा दिल्याने लक्ष्मीचा लाभ होतो; जपाने ऐश्वर्य येते; शिवप्रीत्यर्थ ब्राह्मण जेवू घातले तर सर्वांची तृप्ती; आणि होम केल्याने सर्व कांही प्राप्त होते. 'तरी तू हे व्रत कर.' असे सांगून मैत्रेयी निघून गेली. सीमन्तिनीने तिच्या उपदेशानुसार सोमवार व्रत सुरू केले.७६-७८.

यथाकाल आपली कन्या उपवर झालेली पाहून, 'जे होणार ते चुकेना' अशा विचाराने राजाने तिचा विवाह तिला अनुरूप अशा नलराजाच्या गोत्रातील चंद्रांगद नावाच्या वराशी केला.७९. राजाने जावयाला हत्ती, घोडे, दास-दासी, राज्य इत्यादि आंदण तर दिलेच. पण राजाला पुत्र नसल्याने त्याने चंद्रांगदालाच आपला पुत्रच मानून आपल्याच नगरीत ठेवून घेतले.८०.

**कालिन्द्यामेकदा क्रीडन्मज्जति स्म स तच्चराः । पितरौ श्वशुरौ गत्वा तदूचुस्तत एत्य ते ।।८१।।**
**अन्वेष्यापि न तं प्रापुः शोकं चक्रुस्तदाखिलाः । कन्यानुगन्तुमुत्कापि शवाभावान्निवारिता ।।८२।।**
**तामाश्वास्यानयद्राष्ट्रं चित्रवर्मा नृपः सुता । शोकार्ताप्यकरोत्प्रेम्णा सोमवारव्रतं शुभम् ।।८३।।**
**पुत्रशोकाकुलं त्विन्द्र-सेनं सस्त्रीकमुत्तमम् । खिन्नं संस्थाप्य कारायां तद्राज्यं बुभुजेऽहितः ।।८४।।**
**तं नागिन्योऽम्बुमग्नं स्वं लोकं नीत्वामृतोपमम् । सर्पेशाय ददुः सर्पेट् सुधया तं व्यजीवयत् ।।८५।।**

एकदां कालिन्द्यां क्रीडन् सः मज्जति स्म। तत्+चराः पितरौ श्वशुरौ गत्वा तत् ऊचुः। ततः ते एत्य अन्वेष्य अपि तं न प्रापुः। तदा अखिलाः शोकं चक्रुः। कन्या अनुगन्तुं उत्का अपि शव+अभावात् निवारिता।८१-८२। चित्रवर्मा नृपः तां आश्वास्य राष्ट्रं आनयत्। सुता शोक+आर्ता अपि शुभं सोमवारव्रतं प्रेम्णा अकरोत्।८३। पुत्र+शोक+आकुलं खिन्नं इन्द्रसेनं तु अहितः सस्त्रीकं कारायां संस्थाप्य तत्+राज्यं बुभुजे।८४। अम्बु+मग्नं तं नागिन्यः स्वं अमृत+उपमं लोकं नीत्वा सर्पेशाय ददुः। सर्पेट् तं सुधया व्यजीवयत्।८५।

एकदा तो चंद्रांगद यमुना नदीत जलक्रीडा करीत असता बुडाला. त्याच्या सहचरांनी ते वृत्त त्याच्या मातापित्यांना आणि सासूसासऱ्यांना जाऊन सांगितले. सगळ्यांनी तिथे येऊन नदीत त्याला खूप शोधले. पण तो कांही सापडला नाही. सगळे शोक करू लागले. सीमन्तिनी सहगमन करण्यास उत्सुक होती. पण प्रेत जवळ नसल्याने तिला सगळ्यांनी परावृत्त केले.८१-८२. तिची समजून घालून चित्रवर्मा राजाने आपल्या घरी आणले. शोकग्रस्त असूनही सीमन्तिनीने मंगलदायक सोमवारव्रत प्रीतीपूर्वक चालूच ठेवले.८३. पुत्राच्या शोकाने व्याकुळ आणि खिन्न झालेल्या इन्द्रसेन राजाला त्याच्या शत्रूंनी पत्नीसह कारागृहात टाकले आणि त्याचे राज्य बळकावून घेतले.८४. इकडे पाण्यात बुडालेल्या चंद्रांगदाला नागस्त्रियांनी पाहिला. त्यांनी त्याला पाताळात नेले आणि आपला राजा वासुकी याच्या ताब्यात दिले. नागराजाने त्याला अमृत पाजून जिवंत केले.८५.

**अलौकिकं पुरं नागान्दृष्ट्वा स चकितोऽभवत् । वासुकिः प्राह तं कस्त्वं कस्य भक्तोऽसि मे वद ।।८६।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**सच्छ्लोकनलवंशोत्थ इन्द्रसेनसुतोऽस्म्यहम् । चन्द्राङ्गदाभिधो राजा जामाता चित्रवर्मणः ।।८७।।**
**कालिन्द्यां पतितस्त्वत्र केनानीतो न वेद्मि तत् । दैवाद्वो दर्शनं जातं सफलं जन्म कर्म मे ।।८८।।**

सः अलौकिकं पुरं, नागान् दृष्ट्वा चकितः अभवत्। वासुकिः तं प्राह। 'त्वं कः? कस्य भक्तः असि? मे वद।'८६। चन्द्रांगद उवाच। 'अहं सत्+श्लोक+नल+वंश+उत्थ इन्द्रसेन+सुतः चन्द्रांगद+अभिधः राजा चित्रवर्मणः जामाता अस्मि।८७। (अहं) कालिन्द्यां पतितः। अत्र तु केन आनीतः तत् न वेद्मि। दैवात् वः दर्शनं जातम्। मे जन्म कर्म सफलम्।'८८।

ते पाताललोकातील अलौकिक नगर आणि तिथले सर्व नाग पाहून तो चंद्रांगद विस्मित झाला. वासुकीने त्याला विचारले, 'तूं कोण आहेस? आणि कुणाचा भक्त आहेस? मला सांग.' इथे अशी एक शंका उपस्थित होऊ शकते की कर्मकांडात हे व्रत आणि उपासना यांचा समावेश असंगत आहे. पण देवताज्ञानपूर्वक कर्म हे श्रेष्ठ मानलेले आहे. व्रताच्या निमित्ताने देवताज्ञानासहित (विद्या) कर्माचे (अविद्या) अनुष्ठान (*विद्यांचाविद्यां च*) श्रुतीच्या प्रतिपादनाला धरून आहे (ईश उ. ९:१२).८६. चंद्रांगद म्हणाला, 'मी पुण्यश्लोक नल राजाच्या वंशांत जन्मलेला इन्द्रसेन राजाचा पुत्र आहे; माझे नाव चंद्रांगद असून मी चित्रवर्मा राजाचा जावई आहे.'८७. 'कालिंदी नदीत मी बुडाल्याचे स्मरते; पण मला इथे कुणी आणले ते माहीत नाही. माझ्या सद्भाग्याने आपले दर्शन झाले. हे माझ्या जन्माचे सार्थकच झाले!'८८.

**सृष्ट्यादिहेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयोऽप्यजः । कैलासे मूर्तिमद्योऽस्ति शम्भुर्नः कुलदैवतम् ।।८९।।**

**।। वासुकिरुवाच ।।**

**पूतोऽस्यत्र पुरे तिष्ठ भुञ्जन्भोगानमानुषान् । सुधाकल्पद्रुपूर्णे रुक्-शुग्भीनिद्रालयोनिते ।।९०।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**मां तु मत्वा मृतं नद्यां पितरौ मे मरिष्यतः । शोकार्तापि वधूर्वर्षे वर्तमाने विवाहिता ।।९१।।**

'सृष्टि+आदि+हेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयः अजः यो कैलासे मूर्तिमत् अस्ति (सः) शंभुः नः कुलदैवतम्।'८९। वासुकिः उवाच। 'पूतः असि! अत्र सुधा+कल्प+द्रु+पूर्णे शुक्+भी+निद्रा+लय+ऊनिते पुरे अमानुषान् भोगान् भुञ्जन् तिष्ठ।'९०। चन्द्राङ्गद उवाच। 'मे पितरौ मां तु नद्यां मृतं मत्वा मरिष्यति। शोकार्ता वधूः अपि वर्तमाने वर्षे विवाहिता।'९१।

मग चंद्रांगद आपण कुणाचे भक्त ते सांगत आहे. त्यातून त्याची आध्यात्मिक प्रगल्भता दृग्गोचर होते. तो म्हणतो, 'जगताच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचे कारण असणारा, मायेचाही नियंता, सर्व जीवमात्रांच्या अंतरांत राहून त्यांचे नियंत्रण करणारा, जीवापासून अभिन्न असा साक्षी, चैतन्यरूप आणि निर्विकार भगवान शिव, जो कैलासावर मूर्तरूपाने राहतो तोच आमचे कुलदैवत आहे. यावरून मूर्तिमंत शंकर मानवांना दृग्गोचर नसले तरी त्यांची उपासना परंपरेने आमच्या कुलांत चालत आलेली आहे असे सांगितले आहे. 'जो ज्याची उपासना करतो तो त्याच्यासारखाच होतो', या मुद्गल उपनिषदाच्या (३ः३) वचनानुसार चंद्रांगद हा शिवसायुज्याचा अधिकारी ठरतो.८९. वासुकी हे ऐकून प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'तू पावन आहेस. इथे पाताललोकातच राहून अलौकिक भोगांचा भोग घे. इथे अमृताचे साठे आहेत, कल्पवृक्षाच्या बागा आहेत. शोक, भय, निद्रा आणि मृत्यू यांची इथे वार्ताही नाही.'९०. चंद्रांगद उत्तरला, 'माझे मातापिता मी नदीत बुडून मेलो असे समजून प्राण देतील. माझे या वर्षीच लग्न झाले आहे. माझी शोकाकुल पत्नीसुद्धा माझ्याविना जगू शकणार नाही.'९१.

**श्रुत्वेति चेद्व्रजेत्युक्त्वा रत्नभूषामृतादिकम् । दत्वाऽह्यश्वौ मनोवेगौ गमयामास तौ स तु ।।९२।।**
**स ससर्पोऽश्वमारुह्य गच्छन् प्रेक्ष्य मनोजवः । कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं जगौ ।।९३।।**
**वधूः कस्यासि कन्या त्वं शोकार्तासि कुतोऽङ्गने । सा तच्छ्रुत्वा सखीं प्राह कथयास्मै सविस्तरम् ।।९४।।**

**।। सख्युवाच ।।**

**चन्द्राङ्गदवधूश्चित्र-वर्मकन्येयमत्र तु । प्रियो नष्टस्तच्छुगार्ता स्नात्यत्राद्यास्ति सद्व्रतम् ।।९५।।**

(वासुकिः) इति श्रुत्वा 'व्रज' इति उक्त्वा मनो+वेगौ अहि+अश्वौ, रत्न+भूषा+अमृतादिकं दत्वा तौ गमयामास।९२। सः ससर्पः अश्वं आरुह्य मनोजवः कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं प्रेक्ष्य जगौ।९२। '(हे) अङ्गने, त्वं कस्य वधूः, कन्या असि? कुतः शोक+आर्ता असि?' सा तत् श्रुत्वा सखीं प्राह, 'अस्मै सविस्तरं कथय।'९३। सखी उवाच। 'इयं चन्द्राङ्गद+वधूः चित्रवर्म+कन्या। अत्र तु प्रियः नष्टः। तत्+शुक्+आर्ता। अद्य सत्+व्रतं अस्ति। (अतः) अत्र स्नाति।९५।

हे ऐकून वासुकी म्हणाला, 'मग तुला जायला पाहिजे.' त्याने त्याच्या साह्याकरता एक सर्प आणि मनासारखा वेगवान घोडा दिला. शिवाय दिव्य रत्ने, भूषणे, अमृत इत्यादि भेटीही दिल्या आणि त्या दोघांना निरोप दिला.९२. त्या नागाला बरोबर घेऊन घोड्यावर बसून तो चंद्रांगद मनोवेगाने कालिंदी नदीच्या तीरावर पोचला. त्या दिवशी नेमका सोमवारच असल्याने व्रताच्या अनुष्ठानासाठी सीमन्तिनीही तिथे आली होती. तिला सौभाग्यालंकारविरहित विधवेच्या वेषात पाहून तो खिन्न झाला. त्याने तिला विचारले.९३. 'बाईसाहेब, आपले पती कोण आहेत. पिता कोण आहेत? आणि आपण इतक्या दुःखीकष्टी का आहात?' त्यावर तिने आपल्या सहचरींना त्याला सर्व सविस्तर सांगायला सांगितले.९४. तिच्या सख्यांनी त्याला सांगितले, 'ही चंद्रांगदाची पत्नी आणि चित्रवर्म्याची कन्या आहे. इथेच ह्या नदीत तिचा पती बुडून मरण पावला. त्यामुळे ती शोकपीडित आहे. आज सोमवारचे व्रत असल्याने ही इथे स्नानासाठी आली आहे.९५.

**कारायां श्वशुरावस्याः संस्थाप्य बुभुजे स्वयम् । राज्यं रिपुः सोमवार-व्रतमेषा करोत्यतः ।९६।।**
**सीमन्तिन्यपि तद्रूपं दृष्ट्वा स्वपतिसन्निभः । कोऽयं धूर्तोऽसि यक्षो वा भाति वा स्वप्नहृद्भ्रमः ।।९७।।**
**इति मत्वा शुशोचैनामाश्वास्याहैष्यति त्र्यहात् । पुण्याद्भर्ता तवेत्युक्त्वा राष्ट्रं चन्द्राङ्गदो ययौ ।।९८।।**
**सापि तूष्णीं ययौ राष्ट्रं पितुश्चन्द्राङ्गदस्त्वरिम् । स्वागमं श्रावयामास स भीतो मुक्तवान्नृपम् ।।९९।।**
**द्विषा क्षमापितो मुक्तश् चन्द्रसेनः समागतम् । श्रुत्वा नष्टं सुतं वध्वा प्रेमाश्रूत्तोऽभवत्क्षणात् ।।१००।।**

अस्याः श्वशुरौ कारायां संस्थाप्य रिपुः स्वयं राज्यं बुभुजे। अतः एषा सोमवारव्रतं करोति।'९६। सीमंतिनी अपि तत्+रूपं दृष्ट्वा 'स्व+पति+सन्निभः कः अयं? धूर्तः अस्ति? यक्षः वा? स्वप्न+हृत्+भ्रमः वा भाति?'९७। इति मत्वा शुशोच। एनां आश्वास्य चन्द्राङ्गदः आह। 'तव पुण्यात् तव भर्ता त्रि+अहात् एति।' इति उक्त्वा (सः) राष्ट्रं ययौ।९८। सा अपि तूष्णीं पितुः राष्ट्रं ययौ। चन्द्राङ्गदः अरिं स्व+आगमं श्रावयामास। स भीतः नृपं मुक्तवान्। द्विषा क्षमापितः मुक्तः चन्द्रसेनः समागतं श्रुत्वा (नृपः) वध्वा प्रेम+अश्रूत्तः अभवत्।९९।

हिच्या सासूसासऱ्यांना बंदीशाळेत टाकून शत्रूंनी त्यांचे राज्य बळकावले आहे. तरी ही सोमवार व्रत करीत असते.'९६. त्या वेळी सीमंतिनीने त्याचे रूप निरखून पाहिले तेव्हां, 'हा आपल्या पतीसारखाच दिसतो आहे. कोण असेल हा? कुणी तोतया किंवा यक्ष असेल का? की माझ्या मनाचा हा खेळ नसेल ना? की हे स्वप्नच आहे?'९७. अशा विचारांनी कासावीस होऊन ती रडू लागली. चंद्रांगदाने तिचे सांत्वन केले. म्हणाला, 'शोक करू नकोस. तुझ्या पुण्याईने तुझा पती तीन दिवसात परत येईल.' असे बोलून तो आपल्या राज्याकडे निघून गेला.९८. तीसुद्धा आपल्या पित्याच्या नगरीला परतली. पण ही हकीकत तिने कुणालाही सांगितली नाही. चंद्रांगदाने आपले राज्य बळकावलेल्या शत्रूंना आपल्या आगमनाची सूचना दिली. त्यांनी घाबरून इंद्रसेन राजाला कारागृहातून सोडले(९९) आणि त्याची क्षमा मागितली. राजा आणि राणी चंद्रांगदाच्या आगमनाची वार्ता ऐकून आनंदाने गहिवरले.१००.

**अलङ्कृतं पुरं सोऽपि प्रविश्य पितरौ दृढम् । समालिङ्ग्यादितः सर्वं शशंस पुलकाङ्कितः ।।१०१।।**
**सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्पित्रनुज्ञया । गत्वा श्वशुरराष्ट्रं स्व-भार्याशोकं जहार सः ।।१०२।।**
**आनीतानर्घवस्तूनि तस्यै दत्वा तया सह । राज्यमेत्याभिषिक्तः स जिष्णुवद्बुभुजे श्रियम् ।।१०३।।**
**इयान् व्रतप्रभावस्तद्-व्रतं कुर्वित्यजोऽब्रवीत् । ततः प्रभृत्युभौ भक्त्या चेरतुर्व्रतमुत्तमम् ।।१०४।।**
**गुर्वाज्ञयेयितुर्गेहं प्रत्यब्दं गुरुदर्शनम्। कृत्वा श्रीपुत्रपौत्राढ्यावुभयीं सिद्धिमापतुः ।।१०५।।**

सः अपि अलङ्कृतम् पुरं प्रविश्य पितरौ दृढं समालिङ्ग्य पुलकाङ्कितः सर्वं आदितः शशंस।१०१। सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्। पितृ+अनुज्ञया श्वशुर+राष्ट्रं गत्वा सः भार्या+शोकं जहार।१०२। आनीत+अनर्घ+वस्तूनि तस्यै दत्वा तया सह राज्यं एत्य अभिषिक्तः सः जिष्णुवत् श्रियं बुभुजे।१०३। इयान् व्रत+प्रभावः। 'तत् व्रतं कुरु।' इति अजः अब्रवीत्। ततः प्रभृति उभौ उत्तमं व्रतं भक्त्या चेरतुः।१०४। गुरु+आज्ञया गेहं ईयतुः। प्रति अब्दं गुरु+दर्शनं कृत्वा उभयीं सिद्धिं आपतुः।१०५।

चंद्रांगदही सजविलेल्या नगरात प्रवेश करून मातापित्यांना कडकडून भेटला. प्रेमभराने त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्याने त्यांना सर्व हकीकत सविस्तर निवेदन केली.१०१. आपल्यासोबत आलेल्या सर्पाचा सत्कार करून त्याला त्याच्या राज्याला - पाताळाला बोळविले. नंतर आपल्या वडिलांची अनुज्ञा घेऊन सासऱ्याच्या राज्याला जाऊन त्याने आपल्या पत्नीचे दुःख निवारण केले.१०२. पाताळातून आणलेल्या मौल्यवान वस्तू तिला देऊन तिला प्रसन्न केले. नंतर तिला घेऊन तो आपल्या नगरीला परतला. तिथे इंद्रसेनाने त्याला राज्याभिषेक केला. अशा रीतीने त्याने सीमन्तिनीसह इंद्राप्रमाणे ऐश्वर्य भोगले.१०३. ही कथा सांगून श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, 'असा हा सोमवारव्रताचा प्रभाव आहे. तरी तू हे व्रत कर!' तेव्हापासून ती दोघे दंपती त्या उत्तम व्रताचे आचरण करू लागले.१०४. नंतर श्रीगुरूंची आज्ञा घेऊन ते आपल्या घरी माहुरला गेले. दर वर्षी त्यांचा श्रीगुरूंच्या दर्शनाला येण्याचा नियम होता. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही सिद्धी त्यांना लाभल्या.१०५.

**एवं जगन्मङ्गलमङ्गलात्मा मनुष्यभावात्परिगृह्य भक्तान् ।**
**सञ्चारपूतां जगतीं विधाय ततान लीलाममलामघघ्नीम् ।।१०६।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे दम्पतीगुरुसंवादो नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः सप्तदशोऽध्यायः ।।१७।।**

**सप्ताहपारायणे चतुर्थः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम्। द्वितीयदिने आरम्भे श्रीगुरुस्तुतिः।**

एवं जगत्+मङ्गल+मङ्गल+आत्मा मनुष्य+भावात् जगतीं सञ्चार+पूतां विधाय अमलां अघघ्नीं लीलां ततान।१०६।

अशा प्रकारे जगाला सुखवणाऱ्या आनंदस्वरूप परमात्म्याने मनुष्यरूपाने भक्तांचा उद्धार करीत संचार करून ह्या भूतलाला पावन केले आणि आपल्या सर्व पावक आणि पापहारी लीलांचा विस्तार केला.

**समारोप -** सुवासिनींना पातिव्रत्यधर्मानेच ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधते, दुसरा कोणताही धर्म नाही; तसेच पतीच्या मृत्यूनंतर सहगमन हाच स्त्रीचा मुख्य धर्म आहे. ते शक्य नसेल तर तिने वैधव्यधर्माचे पालन करावे. तसे केल्याने निपुत्रिक स्त्रीलासुद्धा ब्रह्मचाऱ्यासारखी स्वर्गप्राप्ती होते. हे सर्व प्रतिपादन मागच्या (सोळाव्या) अध्यायात केले या अध्यायात संवादरूपाने स्त्रियांना मंत्राचा अधिकार नसला तरी व्रताच्या आचरणाने उभयतः कल्याण होते असे सांगून **स्त्रियांना मोक्षप्राप्तीमध्ये स्वातंत्र्य** आहे असे स्पष्ट केले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला चौथा आणि प्रथमपासून सतरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अष्टादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**निद्रितं मोहतम्यां मे मनोऽहङ्कारघूर्णितम् । बोधार्कोदयबुद्धं तत् पातुमैच्छत्कथामृतम् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**वत्स विष्णौ प्रबुद्धोऽसि यत्तृप्तिः शृण्वतोऽपि नो । मन्ये त्वयि प्रसादोऽस्ति श्रीमद्भगवतो हरेः ।।२।।**
**शृण्वेको ब्राह्मणस्तत्र त्यक्तान्यान्नप्रतिग्रहः । दैवाप्तभुगृती शान्तोऽसक्तः कर्मपरो गृही ।।३।।**

नामधारक उवाच। मोह+तम्यां निद्रितं अहङ्कार+घूर्णितं मे मनः बोध+अर्क+उदय+बुद्धं तत् कथा+अमृतं पातुं ऐच्छत्।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स विष्णौ प्रबुद्धः असि यत् शृण्वतः अपि नो तृप्तिः। श्रीमत्+भगवतः हरेः त्वयि प्रसादः अस्ति (इति) मन्ये।२। शृणु। तत्र एकः त्यक्त+अन्न+प्रतिग्रहः दैव+आप्त+भुक् ऋती शान्तः असक्तः कर्मपरः गृही ब्राह्मणः (अभूत्)।३।

श्रीगणेशाय नमः। अथाऽष्टादशोध्यायः। *ब्राह्मणीचा स्वभाव सुधारुनि अठराव्यांत। सांगती अखिल कर्मकांड श्रीगुरुनाथ।।१।।* नामधारक म्हणाले, 'मोहरूपी रात्रीत झोपलेले - आत्मस्वरूपाला विसरलेले, माझे मन आपल्या बोधरूपी सूर्याच्या उदयाने जागे झाले आहे. भानावर आले आहे. त्यामुळे मी श्रीगुरूंच्या लीलारूपी अमृताच्या पानाला उत्सुक झाले आहे.'१. सिद्ध म्हणतात, 'बेटा! ज्या अर्थी इतका वेळ श्रवण करूनही तुला तृप्ती न वाटता अधिकच ऐकण्याची इच्छा होते आहे त्या अर्थी तू खरेच व्यापक श्रीगुरूंच्या विषयी जाग्रत झाला आहेस. तुझ्यावर त्या हरीचा, भगवंताचा कृपाप्रसाद झाला आहे असे मला वाटते.'२. ऐक तर! तिथे गाणगापुरात परान्नाचा त्याग केलेला, दैवाने मिळेल तेच संतोषाने सेवन करणारा, सत्यवचनी, शांत, कर्मनिष्ठ पण अनासक्त वृत्तीचा एक गृहस्थ ब्राह्मण राहत होता.३.

**तत्स्त्रीः कृत्येव सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वान्यसद्मनि । लभन्ते स्वंशुकार्थास्तद् दृष्ट्वा पतिमगर्हयत् ।।४।।**
**भोक्तुं भर्त्रा सहाहूता धनिनैकेन सैकदा । पत्याऽक्रुट्कामलोभेन निषिद्धैत्यावदद्गुरुम् ।।५।।**
**दीनां कुचैलां क्षुधितां पत्या साकं धनी गृहे । दाताह्वयति भोक्तुं मां पतिं बोधय नैति सः ।।६।।**
**तच्छ्रुत्वाहूय तं गच्छ भोक्तुं वध्वेत्यजोऽब्रवीत् । स प्राह नियमं हित्वा तथा कुर्वे त्वदाज्ञया ।।७।।**

तत्+स्त्रीः कृत्या इव। अन्य+सद्मनि सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वा सु+अंशुकाः अर्थान् (च) लभन्ते। तत् दृष्ट्वा पतिं अगर्हयत्।४। सा एकदा भर्त्रा सह भोक्तुं आहूता। अ+क्रुट्+काम+लोभेन पत्या निषिद्धा। (सा) गुरुं एत्य अवदत्।५। दीनां कुचैलां क्षुधितां मां धनी दाता पत्या साकं गृहे आह्वयति। सः न एति। पतिं बोधय।६। तत् श्रुत्वा अजः तं आहूय अब्रवीत् वध्वा भोक्तुं गच्छ। सः प्राह, नियमं हित्वा त्वत्+आज्ञया तथा कुर्वे। ७।

त्याची पत्नी मात्र कर्कशा आणि दुष्ट स्वभावाची होती. गाणगापूरला येणाऱ्या श्रीमंत लोकांकडे जाऊन सगळे गोडधोड खातात; शिवाय त्यांना चांगलीचुंगली वस्त्रे आणि दक्षिणाही मिळते हे पाहून तिला कुणाचेही निमंत्रण न स्वीकारणाऱ्या आपल्या नवऱ्याचा तिरस्कार वाटत असे.४. तिला एकदा एका धनवंताने पतीसह भोजनाचे आमंत्रण दिले. तिच्या क्रोध-काम-लोभरहित पतीने तिला जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हा ती श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना नवऱ्याचे गाऱ्हाणे सांगू लागली.५.

'पहा ना गुरुमहाराज! आम्ही कायमचेच दरिद्री आहोत. ना पोटभर अन्न ना अंगभर वस्त्र कधी असते! आज एका दानशूर श्रीमंताने त्याच्या घरी आम्हाला दोघांना जेवायला बोलावले आहे. पण हे कांही ऐकायलाच तयार नाहीत. तुम्हीच त्यांना सांगा. कधी तरी पोटभर गोडधोड खायला मिळेल!'६. तिचे ते बोलणे ऐकून श्रीगुरूंनी तिच्या पतीला बोलावून घेतले आणि त्याला आपल्या पत्नीसह भोजनाला जायला सांगितले. तो म्हणाला, 'मी माझा नियम मोडूनसुद्धा आपल्या आज्ञेचे पालन करीन.'७.

**इत्युक्त्वागात्तया भोक्तुं श्वक्रोडोच्छिष्टपाकतः । भुञ्जन्ती ददतेऽन्नं सा दृष्ट्वा पत्ये शशंस तत् ॥८॥**
**उत्थायोभौ ततः खिन्नौ गुरुं प्राप्य तदूचतुः । स प्राहाङ्गाद्य लब्धं ते स्त्रीः परान्नसुखं परम् ॥९॥**
**सोचेऽद्य च्छलितो भर्ता क्षन्तव्यो मन्तुरद्य मे । तामाह श्रीगुरुरितः पत्यनुज्ञानुगा भव ॥१०॥**

**॥ विप्र उवाच ॥**

**निष्ठाऽन्यथा कृता मेऽद्य दुष्टयाघं कथं व्रजेत् । जन्मप्रभृत्यद्य यावन् नेदृक्पापं मया कृतम् ॥११॥**

इति उक्त्वा तया भोक्तुं अगात्। भुञ्जन्ती सा श्व+क्रोड+उच्छिष्ट+पाकतः अन्नं ददते (इति) दृष्ट्वा तत् पत्ये शंशस।८। ततः उभौ खिन्नौ उत्थाय गुरुं प्राप्य तत् ऊचतुः। सः प्राह। (हे) अङ्ग स्त्रीः अद्य ते परं परान्न+सुखं लब्धं (किम्)?९। सा ऊचे। 'अद्य (मया) भर्ता छलितः। मे मन्तुः क्षन्तव्यः।' श्रीगुरुः तां आह। 'इतः पति+अनुज्ञा+अनुगा भव।'१०। विप्र उवाच। 'अद्य दुष्टया मे निष्ठा अन्यथा कृता। अघं कथं व्रजेत्? जन्म+प्रभृति अद्य यावत् ईदृक् पापं मया न कृतम्।'११।

असे बोलून तो ब्राह्मण आपल्या स्त्रियेसह जेवायला गेला. तिथे जेवताना तिला दिसले की कुत्र्यांनी आणि डुकरांनी उष्टावलेले अन्नच वाढण्यात येत आहे. तिने ते आपल्या पतीला सांगितले.८. तेव्हा ते दोघेही जेवण टाकून उठले आणि श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना ते सर्व वृत्त सांगितले. ते म्हणाले, 'बाई गं! तुला आज परान्नभोजनाचे परमसुख मिळाले ना?'९. ती म्हणाली 'आज मी खरोखर पतीचा छळ केला. माझ्या ह्या अपराधाची क्षमा असावी.' त्यावर श्रीगुरू तिला म्हणाले 'इथून पुढे तू पतीच्या आज्ञेत राहा.'१०.

तो ब्राह्मण म्हणाला, या दुष्ट स्त्रीने माझ्या नियमाचा भंग करविला. आता हे पाप कसे जाईल? मी जन्मापासून आजपावेतो असे पाप केले नव्हते.११.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीस्त्वय्येष दोषो न दुश्चित्तं न कुलस्त्रियः । कार्यं सातः परं नेच्छेत् तथात्तुं क्वापि नैह्यतः ।।१२।।**
**कदाचिद्यस्य कस्यापि कर्माभाव उपस्थिते । द्विजाभावात्तु भोक्तव्यं तत्र दोषोऽन्यथा भवेत् ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**परान्नं कस्य भोक्तव्यं कस्मिन्गेहे न कुत्र वा । कस्माद्दानं गृहीतव्यं निषिद्धं चापि शंस मे ।।१४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सद्विप्रवैदिकगुरुश्वशुरस्वशिष्य-मातामहालय उ भोजनतो न दोषः ।**
**नाऽचारहीनपरकर्मरताहितार्त-क्षुद्राशुचिस्वगुरुदुःखकरान्नमद्यात् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। एष त्वयि न दोषः। कुलस्त्रियः दुश्चित्तं न कार्यम्। सा अतः परं तथा न इच्छेत्। (त्वं) अतः (परं) क्व अपि अत्तुं न एहि।'१२। 'कदाचित् यस्य कस्य अपि द्विज+अभावात् कर्म+अभाव उपस्थिते तु भोक्तव्यम्। अन्यथा तत्र दोषः भवेत्।'१३। विप्र उवाच। परान्नं कस्य भोक्तव्यम्? कस्मिन् गेहे कुत्र वा न (भोक्तव्यम्)? कस्मात् दानं गृहीतव्यम्? (कस्मात्) निषिद्धम्? मे शंस।१४। श्रीगुरुः उवाच। 'सद्विप्र+वैदिक+गुरु+श्वशुर+स्व+शिष्य+मातामह+आलये भोजनतः न दोषः। आचारहीन+परकर्मरत+अहितार्त+क्षुद्र+स्व+गुरु+दुःख+कर+अन्नं न अद्यात्।'१५।

श्रीगुरू म्हणाले, 'हा दोष तुला लागणार नाही; कारण आपल्या धर्मपत्नीचे मन राखायला हवे. तीसुद्धा यापुढे तशी धर्मविरुद्ध इच्छा करणार नाही. तूसुद्धा यानंतर कुणाकडेही जेवायला जाऊ नकोस.१२. मात्र याला अपवाद आहे. एखाद्याचे श्राद्धादि कर्म भोजनाला ब्राह्मण न मिळाल्याने जर अडले असेल तर मात्र तिथे जेवायला हवे. अन्यथा म्हणजे कर्मलोपावाचून इतर कारणाने - जिभेचे चोचले पुरविण्यासाठी जेवल्यास मात्र दोष आहे. किंवा तिथे कर्मलोप होत आहे हे जाणूनही दुराग्रहाने न जेवल्यासही दोष लागतो.'१४. ब्राह्मणाने विचारले की, गुरुमहाराज! कुणाकडचे परान्न पवित्र असते? कुणाकडे घ्यावे आणि कुणाकडे घेऊ नये? तसेच कुणाचे दान घ्यावे आणि कुणाचे निषिद्ध आहे? ते आपण मला सांगावे. श्रीगुरू म्हणाले, 'सदाचारी ब्राह्मण अध्यापक; अन्नदाता, भयहर्ता इत्यादि, गुरू; सासरा; बांधव;

**दातारमेति सततं सुकृतं तदन्न-भुक्त्यास्य भोक्तुरघमेति तथाप्यमन्त्रात् ।**
**हूत्याङ्घ्रिजस्य च तथा खलु मासपुण्यं दर्शे परान्नग्रहणादपयाति भोक्तुः ।।१६।।**
**कन्यालयेऽर्भजननोत्तरमन्नमद्याल् लक्ष्मीरपैति सततं परगेहवासात् ।**
**ग्राह्यं च दानमपि सज्जनतो ग्रहे सत् क्षेत्रादिके न न कुहाप्यतिनिन्द्यदानम् ।।१७।।**
**उत्तमं यज्ञशिष्टान्नं दीक्षितब्रह्मिणोरपि । स्वार्थं पक्तं क्वापि नाद्यादद्याद्यज्ञार्पितं शुभम् ।।१८।।**

सततं तत्+अन्न+भुक्त्या भोक्तुः सुकृतं दातारं एति। अस्य अघं (भोक्तुं) एति। अङ्घ्रिजस्य हूत्या तथा एव। दर्शे परान्न+ग्रहणात् भोक्तुः मास+पुण्यं अपयाति।१६। कन्या+आलये अर्भ+जनन+उत्तरं अद्यात्। सततं पर+गेह+वासात् लक्ष्मीः अपैति। सज्जनतः दानं ग्राह्यम्। क्षेत्रादिके न सत्। अतिनिन्द्यदानं न कुह अपि।१७। यज्ञ+शिष्ट+अन्नं उत्तमम्। दीक्षित+ब्रह्मिणोः अपि। स्व+अर्थं पक्तं क्व अपि न अद्यात्। यज्ञ+अर्पितं शुभं (अन्नं) अद्यात्।१८।

शिष्य; मातामह यांच्या घरी जेवल्यास दोष नाही. मात्र आचारहीन, परकर्मांत रमणारा, लोभादि रिपूंनी अभिभूत झालेला, कृपण, आपल्या कुटुंबीयांना किंवा गुरूंना कष्ट देणारा यांचे अन्न घेऊ नये.'१५. सतत एखाद्याच्या घरी जेवण घेतल्याने जेवणाऱ्याचे पुण्य जेवू घालणाऱ्याला जाते; तसेच त्याचे पाप जेवणाऱ्याला जाते. शूद्राकरवी ब्राह्मणाच्या घरचे भोजनाचे आमंत्रण आल्यास त्याचप्रमाणे पुण्य-पाप जाते-येते. दर्शादिवशी (अमावास्या) परान्न घेतले तर महिन्याभराचे पुण्य अन्नदात्याला जाते व त्याचे पाप आपल्याला येते.१६. मुलीच्या घरी तिला एक अपत्य झाल्यावर जेवावे. सतत दुसऱ्याच्या घरी राहण्याने लक्ष्मी जाते. सत्प्रवृत्त, स्वधर्मनिष्ठ व्यक्तीकडून दान घ्यावे. पण ते तीर्थाच्या वा क्षेत्राच्या ठिकाणी अथवा ग्रहणादि पर्वांत घेऊ नये. निंद्य दान किंवा महादान कधीही घेऊ नये. सुवर्ण, हत्ती, घोडा, तीळ, दासी, रथ, भूमी, घर, वधू आणि कपिला गाय ही अग्निपुराणात महादाने सांगितली आहेत.१७. यज्ञांत अर्पण करून उरलेले अन्न उत्तम होय. तसेच अग्निहोत्रादि दीक्षा घेतलेल्या ब्राह्मणाचे अन्नही उत्तमच आहे. केवळ आपल्यासाठी शिजवलेले अन्न कुणीही घेऊ नये. यज्ञात अर्पण केलेले पवित्र अन्नच घ्यावे.१८.

**नश्येज्जपादापदि दानदोषः स्वाचारमप्यापदनापदिष्टम् ।**
**विविच्य विप्राः प्रचरन्ति ये न क्वाप्याधिदैन्यर्णगदान्स्पृशन्ति ।।१९।।**
**स्वाचारहीनाः परकर्मसक्तास्तेऽमुत्र चात्रापि सदार्तिभाजः ।**
**तस्माद् द्विजाचारममुं निराशीस् त्वं कर्तुमर्हस्युभयार्थदं वै ।।२०।।**

**।। विप्र उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ दयाब्धे भगवन्प्रभो । सद्गुरो सर्वमाचारं वक्तुमर्हसि मे हरे ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**विस्तृतोऽब्धिवदाचारो मुनीनामपि दुर्ग्रहः । तस्मात्सारं सद्गतिदं वक्ष्ये शाक्त्यादिसंमतम् ।।२२।।**

आपदि दान+दोषः जपात नश्येत्। स्व+आचार अपि आपत्+अनापत्+इष्टं विविच्य ये विप्राः प्रचरन्ति (ते) क्व अपि आधि+दैन्य+ऋण+गदान् स्पृशन्ति।१९। स्व+आचार+हीनाः पर+कर्म+सक्ताः ते अमुत्र च अत्र अपि सदा आर्ति+भाजः। तस्मात् (हे) द्विज, अमुं आचारं त्वं निराशीः कर्तुं अर्हसि। (तत्) वै उभय+अर्थदम्।२०। विप्र उवाच। '(हे) देवदेव, (हे) जगन्नाथ, (हे) भगवन्, (हे) प्रभो, (हे) सद्गुरो (हे) हरे! मे सर्वं आचारं वक्तुं अर्हसि।'२१। श्रीगुरुः उवाच। 'अब्धिवत् विस्तृतः आचारः मुनीनां अपि दुर्ग्रहः। तस्मात् सद्गतिदं शाक्त्य+आदि+संमतं सारं वक्ष्ये।२२।

संकटामुळे घडलेल्या परिग्रहाचा दोष गायत्रीजपाने किंवा '*पुनर्मामैतु*' इत्यादि दोन मंत्रांच्या जपाने जातो. (आश्वलायन गृह्यसूत्र ३:६:९-१) संकटांत किंवा संकट नसताना कोणता आचार इष्ट आहे ह्याचा विचार करून जे ब्राह्मण वागतात त्यांना, मानसिक आधि, दारिद्र्य, ऋण किंवा रोगराई स्पर्शही करू शकत नाहीत.१९. आपल्या विहित आचाराचा त्याग करून दुसऱ्याचे कर्मांत रमणारे या भूलोकांत किंवा परलोकांतही दुःखच पावतात. त्यासाठी हे ब्राह्मणा, हा आचार तू निष्काम रीत्या करावास. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिकही कल्याण साधते.२०. यावर त्या ब्राह्मणाने महाराजांची प्रार्थना केली, 'देवाधिदेवा, जगदीशा, भगवंता, दयासागरा, समर्था, सद्गुरो! आपण मला सर्व आचार सांगावा!'२१.

**आचार आद्यो धर्मो नुः सुखदस्तूभयत्र सः । श्रुतिस्मृतिपुराणोक्त-चरणं विष्णुचिन्तनम् ।।२३।।**
**श्रद्धया देशकालाप्त-दानं पात्रे दया क्षमा । शौचानसूयानायासाऽतृट्ताकार्पण्यमङ्गले ।।२४।।**
**सत्ता दैवीसम्पदेतल् लक्षणो धर्म उच्यते । श्रैष्ठ्यं कर्माप्यते तस्मात्ततो ज्ञानं ततोऽमृतम् ।।२५।।**

आचारः आद्यः धर्मः। स तु नुः उभयत्र सुखदः। श्रुति+स्मृति+पुराण+उक्त+चरणम्; विष्णु+चिन्तनम्;।२३। श्रद्धया पात्रे देश+काल+आप्त+दानम्; दया+क्षमा+शौच+अनायास+अतृट्ता+अकार्पण्य+मङ्गले।२४। सत्ता, दैवी+संपत् एतत् लक्षणः धर्मः उच्यते। तस्मात् कर्म श्रेष्ठ्यं आप्यते। ततः ज्ञानम्। ततः अमृतम्।'२५।

श्रीगुरू सांगू लागले, आचार सागराप्रमाणे विशाल आहे. ऋषी-मुनींनाही त्याचे ज्ञान होणे दुरापास्त आहे. त्यांतील पराशरादि स्मृतिकारांनी मानलेले सार मी तुला सांगत आहे.२२. 'आचार हा पुरातन धर्म आहे. तोच मानवाला इह आणि परत्र सुखदायक आहे. धर्माची लक्षणे अशी आहेत.(१) श्रुति, स्मृति आणि पुराणांत सांगितल्याप्रमाणे वागणे; (२) श्रद्धापूर्वक, योग्य व्यक्तीला, योग्य देशी, योग्य काळी आपल्या ऐपतीप्रमाणे दान करणे; (३) दया, (४) क्षमा, (५) शौच (पावित्र्य), (६) अधिक सायास न करणे, (७) वितृष्णा (निरिच्छा), (८) कृपणतेचा अभाव, (९) मंगलकारक कर्म करणे, (१०) आस्तिक्य आणि दैवी संपत्ती. दैवी संपत्ती म्हणजे शम, दम, तितिक्षा, समाधान, उपरती आणि मुमुक्षा; किंवा भगवद्गीतेत (१६:२-३) सांगितल्याप्रमाणे अहिंसा सत्य, अक्रोध, त्याग, शान्ती, अपैशुन (परनिंदा न करणे), भूतदया, इंद्रियांवर ताबा, मार्दव, दुराचरणाची लज्जा, चंचलता नसणे, तेज, धैर्य, शौच, अद्रोह आणि निरभिमानता. (*अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्।। तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानता। भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत।।*) या धर्माच्या आचरणानेच कर्माला श्रेष्ठता येते. श्रेष्ठ कर्माचरणानेच आत्मज्ञान लाभते आणि आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो.२३-२५.

**श्रुतिस्मृतिपुराणानि धर्ममूलं श्रुतिर्वरा । तद्वैरे द्वौ वृषौ श्रुत्योर्द्वैधे स्मृत्योस्तु लौकिकः ॥२६॥**
**वर्णाश्रमविभागोक्तो देशकालोचितो वृषः । लौकिकोऽपि चतुर्वर्णैः सेवनीयः प्रयत्नतः ॥२७॥**

श्रुति+स्मृति+पुराणानि धर्म+मूलम्। तत् वैरे श्रुतिः वरा। श्रुत्योः द्वैधे द्वौ वृषौ। स्मृत्योः (द्वैधे) लौकिकः।२६। वर्ण+आश्रम+विभाग+उक्तः देश+काल+उचितः वृषः चतुर्वर्णैः लौकिकः अपि प्रयत्नतः सेवनीयः।२७।

श्रुती (वेद), स्मृती आणि पुराणे हेच धर्माचे मूळ आहेत. ह्यांच्यांत परस्पर विरोध आला तर श्रुतिवचनच श्रेष्ठ ठरते. दोन श्रुतींत विरोध उत्पन्न झाल्यास दोन धर्म होतात. दोन स्मृतींत विरोध असेल तर लौकिक धर्माला अनुकूल अशा स्मृतीने सांगितलेल्या धर्माचा अंगीकार करावा.२६. हा धर्म ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी हे चार आश्रम यांच्यासाठी वेगवेगळा सांगितलेला आहे. तसेच त्यात देश, काल यांचा विचारही केलेला आहे. हा चारी वर्णानी प्रयत्नपूर्वक आचरणांत आणला पाहिजे. 'त्रैलोक्याची रचना करण्याचे सामर्थ्य असलेल्या ब्रह्मदेवाची पदवी प्राप्त झाली तरी लौकिक आचाराचे मनानेसुद्धा उल्लंघन करू नये' असे शास्त्रवचन आहे. महाभारतांत (१८:५:६३) सांगितले आहे की, कसल्याही कामनेसाठी, कुणाच्याही भयाने किंवा कशाच्याही लोभाने, अगदी जीव वांचविण्यासाठीही धर्माचा त्याग करू नये. सुख आणि दुःख हे अनित्य आहेत तर धर्म नित्य आहे. जीव नित्य आहे, त्याच्या उपाधी अनित्य आहेत (*न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः। धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः॥*)२७.

**स्वनुष्ठितादन्यधर्माद् विगुणोपि स्वको वरः । स्वगृह्योक्तोऽविरुद्धोऽपि स्मार्तो ग्राह्यो द्विजातिभिः ।।२८।।**
**नित्यं नैमित्तिकं कर्म नातीयात्काम्यमैच्छिकम् । तत्त्यागी क्वापि न सुखी ब्रह्मीभूतमृते भवेत् ।।२९।।**

सु+अनुष्ठितात् अन्य+धर्मात् विगुणः अपि स्वकः वरः। द्विजातिभिः स्वगृह्य+उक्तः अविरुद्धः स्मार्तः अपि ग्राह्यः।२८। नित्यं नैमित्तिकं कर्म न अतीयात्। काम्यं ऐच्छिकम्। तत्+त्यागी ब्रह्मीभूतं ऋते क्व अपि न सुखी भवेत्।२९।

भगवद्गीतेच्या प्रतिपादनानुसार (३:३५) उत्तम प्रकारे आचरलेल्या परधर्मापेक्षा यथातथा आचरलेला आपला विहित धर्म श्रेष्ठ आहे. स्वधर्मांत मृत्यूही आला तरी कल्याणप्रद आहे; परधर्म भयावह आहे आहे (*श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।।*).

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या त्रैवर्णिकांनी आपापल्या शाखेचा गृह्योक्त धर्म आचरावा. त्याच्याशी विरोध नसलेला स्मार्त धर्मही सर्वांना ग्राह्य आहे. *'सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात्'* ब्रह्मसूत्रानुसार (३:३:१) शाखाभेद जरी असला तरी विधींत भेद नसल्याने उपासनेत फरक पडत नाही.२८. संध्योपासना, होम, पंचमहायज्ञ, दर्शादि कर्मे नित्य होत; जातकर्मादि कर्मे नैमित्तिक होत. ही न केल्यास प्रत्यवाय दोष लागतो. यासाठी ती कधीही चुकवू नयेत. काम्यकर्म न केल्याचा कांही दोष शास्त्रांत सांगितलेला नाही. शिवाय ती केल्याने बंधक होऊ शकतात. (*अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते* भ.गीता ५:१२) 'तर मग काम्य कर्मे करूच नयेत असे का सांगीतले नाही?' असे विचाराल तर त्याचे नियमन आसक्त आणि अनासक्त यांच्यासाठी वेगवेगळे केले आहे. तैत्तिरीय उपनिषदांत '*आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः*' (१:११:१) असे वचन आहे. त्यावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे. 'आचार्यांची अनुज्ञा घेऊन अनुरूप पत्नीचे पाणिग्रहण करून प्रजातंतूचा विच्छेद करू नये. पुत्र झाला नाही तर तो व्हावा म्हणून काम्यादि कर्मांचे अनुष्ठान करावे. हे विवेचन आसक्त लोकांसाठी आहे. *लोकोऽपुत्रस्य नास्ति* ह्या

**प्रमादलुप्तकर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिर्विना । अनुतप्तं प्रयत्नाद्धी-दुःसङ्गापहृतक्रिया ।।३०।।**

प्रमाद+लुप्त+कर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिः। दुःसङ्ग+अपहत+क्रिया हि प्रयत्नात्। विना अनुतप्तम्।३०।

श्रुतीचे मर्म जाणणाऱ्या विरागी लोकांसाठी मात्र बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) वित्तैषणा, लोकैषणा आणि दारैषणा ह्या तिन्हींचा त्याग सांगितला आहे. अशा लोकांना जर तीव्रतर मुमुक्षा असेल तर त्यांनी संन्यास ग्रहण करणेच श्रेयस्कर आहे. इतर आरुरुक्षूंना नित्यनैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान विहित आहे. पण जे मोक्षाला विमुखच आहेत त्यांच्यासाठी काम्यकर्माचे प्रतिपादन केले आहे.

नित्य-नैमित्तिक कर्म सोडणाऱ्याला ना इथे - इहलोकांत, सुख आहे ना परलोकी. याला अपवाद फक्त आत्मसाक्षात्कारी पुरुषाचा आहे. *यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तिश्च मानवः। आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।। नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः।।* भ.गीता ३:१७-१८।। जो आत्मसुखांतच रमलेला आहे, आत्म्यातच तृप्त आहे आणि आत्म्यानेच संतुष्ट आहे त्याला कांहीही कर्म करण्याची आवश्यकता नाही. त्याला न कर्म करण्याचे कांही प्रयोजन असते न कर्म न करण्याचे! त्याला कुणाही जीवापासून कांहीच स्वार्थ साधायचा नसतो.२९.

ज्याचे कर्म अनवधानाने लुप्त झाले आहे त्याची शांडिल्य श्रौतसूत्रानुसार (३:१९:१) प्रायश्चित्ताने शुद्धी होते. वाईट संगतीला लागून, बुद्धिपूर्वक ज्याने आपले कर्म सोडले असेल त्याला शुद्धीसाठी प्रयत्नांची आवश्यकता आहे. याला अपवाद पश्चात्तापाचा आहे. पश्चात्तापाने लगेच शुद्धी होते. पण पश्चात्ताप झाला पाहिजे. तो ईश्वर, गुरू किंवा संत यांच्या कृपेविना होत नाही.३०.

**भजेत्सलक्षणं धर्मं श्रद्धाभक्तियुतो नरः । ब्राह्मणस्तु विशेषेण यतोऽस्मै श्रैष्ठ्यमर्पितम् ।।३१।।**
**दानादाने याजनेज्येऽध्ययनाध्यापने द्विजः । स्नानसन्ध्याजाप्यहोम-पाठयज्ञपरश्चरेत् ।।३२।।**
**वैदिकां तान्त्रिकां मिश्रामाद्यां वैकां चरेत्क्रियाम् । विमलः सुमुखस्नातो द्विराचान्तो गुरूक्तिमान् ।।३३।।**
**त्रिकच्छी धौतसच्छुष्क-द्विवासा यतगोशिखः । मृद्भस्मगन्धान्यतम-लिप्तो दर्भकरः शुचिः ।।३४।।**

श्रद्धा+भक्ति+युतः नरः सलक्षणं धर्मं भजेत्। विशेषतः ब्राह्मणः यतः अस्मै श्रैष्ठ्यं अर्पितम्।३१।स्नान+सन्ध्या+जाप्य+होम+पाठ+यज्ञ+परः द्विजः दान+आदाने, याजन+इज्ये, अध्ययन+अध्यापने चरेत्।३२। वैदिकां तान्त्रिकां मिश्रां वा एकां आद्यां क्रियां चरेत्। विमलः, सुमुखः, स्नातः, द्विः+आचान्तः, गुरु+उक्ति+मान्,।३३। त्रिकच्छी, धौत+सत्+शुष्क+द्विवासा, यत+गो+शिखः, मृत्+भस्म+गन्ध+अन्यतम+ लिप्तः, दर्भकरः, शुचिः।३४।

प्रत्येक माणसाने आपल्या धर्माचे यथासांग आचरण करायला हवे. विशेषतः ब्राह्मणांनी; कारण सर्व वर्णांत त्यांना मोठेपणा दिलेला आहे.३१. स्नान, संध्या, जप, होम, वेदपठण, यज्ञ ह्या कर्मांबरोबरच ब्राह्मणाने दान, परिग्रह, यजन, याजन, अध्ययन आणि अध्यापन ही सहा कर्मे करावीत. त्यांतील परिग्रह, याजन आणि अध्यापन ही उपजीविकेसाठी आहेत; तर इतर अधिक पुण्यसंचयासाठी आहेत.३२. वैदिक आणि तांत्रिक अशा मिश्र विधीने किंवा केवळ वैदिक विधीने गुरूंनी सांगितल्याप्रमाणे कर्म करावे. प्रथम शौचविधि करून मुखमार्जन आणि स्नान करावे. त्यानतंर दोन वेळा आचमन करून(३३) ब्रह्मचाऱ्याने तीन काष्ठे असलेले तर गृहस्थाने पांच काष्ठ्यांचे वस्त्र नेसावे. धुवून चांगली वाळविलेली दोन वस्त्रे धारण करावीत. एक कमरेला आणि एक अंगावर. मग शेंडी बांधून मौन धरावे. गोपीचंदन, भस्म किंवा चंदन धारण करावे. हातांत दर्भ घ्यावेत. पावित्र्याने (सोवळ्याने) कर्म करावे.३४.

**पीठस्थोऽन्तर्जानुकरः प्रकुर्यात्कर्म सत्स्थले । उपोषितो विना नैशं कुर्याद्यज्ञजपार्चनम् ।।३५।।**
**दोषो नौषधगव्येक्ष्वप् फलताम्बूलभक्षणे । कर्म संकल्प्य कार्यं सम्पूर्णतास्येश्वरार्पणात्।।३६।।**
**(क्षेपकः) खेऽर्को यत्रैत्युद्गमास्तौ प्राक्प्रत्यक् ते ततोऽपराः ।।**

सत्+स्थले पीठस्थः अन्तः+जानु+करः कर्म प्रकुर्यात्। यज्ञ+जप+अर्चनं, विना नैशं उपोषितः कुर्यात्।३५। औषध+गव्य+इक्षु+अप्+फल+ताम्बूल+भक्षणे न दोषः। कर्म संकल्प्य कार्यम्। ईश्वर+अर्पणात् अस्य सम्पूर्णता।३६। खे यत्र अर्कः अद्गम+अस्तौ ते प्राक्+प्रत्यक्। ततः अपराः।

पवित्र ठिकाणी आसनावर बसून कर्म करावे; हात गुडघ्याच्या आत असावेत. यज्ञ, जप, पूजा हे उपाशीपोटी करावेत. रात्रीच्या कर्माला हा नियम नाही. औषध, दूध, ऊस (रस), पाणी, फळ, तांबूल ही कर्माच्या आधी घेतली तर दोष नाही. कर्म करताना आधी संकल्प करावा. *यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपः पूजाक्रियादिषु न्यूनं सम्पूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम।।* या नारदपुराणाच्या वचनानुसार (पूर्वपाद १ः१७ः१०८) आणि *प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषु यत् । स्मरणादेव तद्विष्णोः सम्पूर्णं स्यादिति श्रुतिः।।* या स्मृतीनुसार कर्माची संपूर्णता ते ईश्वराला अर्पण केल्यानेच होते.३५-३६.

आकांशात सूर्य जिथे उगवतो ती पूर्व दिशा आणि जिथे मावळतो ती पश्चिम दिशा. त्यापासून इतर दिशा काढता येतात. ज्या प्रदेशात पूर्व काढायची असेल तिथे एक वर्तुळ काढावे. त्याच्या मध्यभागी बारा अंगुळांचा एक शंकू ठेवावा. दिवसाच्या पूर्वार्धात शंकूची सावली जिकडे पडेल त्या सावलीच्या टोकावर खूण करावी. ही पश्चिम दिशा होय. दुपारच्यानंतर शंकूची सावली जिथून वर्तुळाच्या बाहेर पडेल ती पूर्व दिशा. आता ह्या दोन्हीच्या मधोमध जो व्यास आहे त्याच्या टोकांना दक्षिण आणि उत्तर दिशा. चार दिशांच्या मध्यबिंदूवरून विदिशा (आग्नेयादि) काढता येतात. हे दिक्साधन ज्या दिवशी सायनांश सूर्य मेष राशीला येतो त्या दिवशी करावे. इतर दिवशी सूर्यक्रांतीनुसार दिशासाधनेचे वेगळे गणित करावे लागेल.

**द्युनक्तं प्रागुदग्वक्त्रो होमाद्येऽग्न्यादिसंमुखः । सौम्यैन्द्र्यैशान्यनुक्तायां दक्षाङ्गं चोपवीतता ।।३७।।**

द्यु+नक्तं प्राक्+उदक्+वक्त्रः। होमाद्ये अग्नि+संमुखः। अनुक्तायां सौम्य+ऐन्द्र+ऐशानि दक्षाङ्गं च उपवीतता।३७।

अशा रीतीने सूर्योदयावरून दिशा निश्चित होतात. सूर्योदय याचा अर्थ सूर्य त्या त्या लोकांतील जीवांना दृग्गोचर होतो तो आणि अस्त म्हणजे सूर्य दृष्टिआड होणे. ज्या लोकात कुणी प्राणीच निवास करीत नाहीत तिथे सूर्य त्या मार्गाने जाऊनही त्याचा उदय होत नाही आणि अस्तही होत नाही. मग अमरकोशांत सांगितल्याप्रमाणे एका महिन्यांत पितरांचे एक अहोरात्र होते, वर्षांत देवांचे अहोरात्र, देवांच्या हजार युगांचे ब्रह्मदेवाचे दोन अहोरात्र इत्यादि कालगणनेचा कसा संदर्भ लावायचा? जसा या भारतवर्षांत साठ घटकांचा (चोवीस तासांचा) अहोरात्र आहे, त्या मानवी मापाने एक महिन्यांत पितरांचा अहोरात्र होतो. अर्थात मानवी शुक्लपक्षात पितृलोकांत सतत सूर्यदर्शन होते आणि कृष्णपक्षात रात्र असते. त्याच प्रकारे स्वर्गातील देवांचा अहोरात्र मानवी वर्षाएवढा असतो. तिथे मानवी उत्तरायणात सतत सूर्य दिसतो व दक्षिणायनात त्याचा अस्त असतो. जेव्हा अमरावतीला सूर्य माध्याह्नाला येतो तेव्हा दक्षिणेला असलेल्या संयमिनीत (यमपुरी) तो उत्तरेकडे उगवताना दिसतो. जेव्हा संयमिनीत सूर्य माथ्यावर येतो तेव्हा वारुणीत तो उगवताना दिसतो. इलावृत चारी बाजूंनी पर्वतांनी वेढलेले असल्याने तिथे सूर्याचा प्रकाश पर्वतावरील छिद्रांतून प्रवेश करीत असल्याने ऊर्ध्व दिशेला उगवतो आणि खाली मावळतो. छांदोग्यात सांगितल्याप्रमाणे (३:११:२) ब्रह्मलोकात सूर्य सततच प्रकाशत असल्याने उदयास्त नाहीत.

दिवसा पूर्वाभिमुख आणि रात्री उत्तराभिमुख बसून कर्म करावे. होमासाठी अग्नीसंमुख (आश्वलायन गृह्यसूत्र १:१०:१५-१६) आणि पूजेसाठी देवसंमुख बसावे. ज्या कर्मात दिशा सांगितली नसेल तिथे पूर्व, उत्तर किंवा ईशान्येकडे मुख करावे. स्थलाचा निर्देश नसेल तर उजव्या अंगाने बसावे. जानवे उपवीतीला (डाव्या खांद्यावर) असावे.३७.

**आसीनत्वं मध्यपाठो देवतीर्थमनुक्तके । निवीतं कण्ठलम्ब्यार्षं दक्षांसस्थं तु पित्र्यकम् ।।३८।।**
**प्राचीनावीतमन्यांसस्थं सूत्रं तूपवीतकम् । भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा दद्ध्यान्नवं विधेः ।।३९।।**
**त्रिघ्नीकृत्य त्रिपद्या षण्णवतिस्वकरोन्मितम् । तूलादिसूत्रं पुनस्त्रिरावृत्य नवसूत्रकम् ।।४०।।**
**कृत्वा त्रिरावृतं ग्रन्थिं दत्वा काजशिवान्नमन् । प्रोक्ष्याब्लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या धेहि मन्त्रवत् ।।४१।।**

अनुक्तके आसीनत्वं, मध्यपाठः, देवतीर्थं। कंठलंबी+आर्षं निवीतं ऋषि+कर्मणि। पित्र्यकं तु दक्ष+अंसस्थम्।३८। अन्य+अंसस्थं तु उपवीतकम्। भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा विधेः नवं दध्यात्।३९। षण्+नवति+स्वकर+उन्मितं तूलादि+सूत्रं त्रिपद्या त्रिघ्नी+कृत्य पुनः त्रिः आवृत्य नव+सूत्रकं कृत्वा त्रिः+आवृतं क+अज+शिवान् नमन् ग्रन्थिं दत्वा अप्+लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या प्रोक्ष्य मन्त्रवत् धेहि।४०-४१।

स्थिति सांगितली नसेल तर बसून कर्म करावे. पाठ सांगितला नसेल तर मध्यमपाठ असावा. तीर्थ सांगितले नसेल तर देवतीर्थ घ्यावे. जानवे गळ्यात सरळ घातले तर ती निवीती होते; ती ऋषिकर्मांत विहित आहे. पितृकर्मांत जानवे उजव्या खांद्यावर (प्राचीनावीती) असावे.३८. जानवे डाव्या खांद्यावर असल्यास त्याला उपवीती म्हणतात. तसे देवकार्यांत ठेवावे. अस्पृश्य, अंत्यज किंवा अस्पृश्य स्त्री यांना शिवल्यास जानवे भ्रष्ट होते; तसे झाल्यास किंवा तुटल्यास ते जानवे टाकून विधिपूर्वक नवीन धारण करावे.३९. आपल्या हाताने शहाण्णव हात सूत किंवा रेशीमादीचा दोरा त्रिपदी गायत्रीने तिहेरी करावा. तो पुनः तिहेरी करून झालेले नवपदरी सूत्र पुनः तिहेरी करून ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांना नमस्कार करीत त्याला गाठ बांधावी. त्या जानव्याचे *'आपोहिष्ठा'*दि तीन ऋचांनी आणि दहा गायत्रींनी प्रोक्षण करावे. मग *'यज्ञोपवीतं'* इत्यादि मंत्राने ते धारण करावे.४०-४१.

**शश्वद्योज्याः सत्स्थिताग्नि-मन्त्रदर्भासनद्विजाः । पिण्डादिस्थाः कुशा विप्रः प्रेतश्राद्धाच्चितानलः ।।४२।।**
**मन्त्रा गौस्तुलसी नीचेऽसन्तः सन् शोधितो द्विजः । सोङ्कारान् सर्वदा होमे स्वाहान्तान्वामहस्तहृत् ।।४३।।**
**आर्षच्छन्दोदेवताविनियोगज्ञो मनून्जपेत् । शूद्राहृतं द्विजक्रीतं समिद्दर्भाप्सुमाद्यसत् ।।४४।।**

सत्+स्थित अग्नि+मंत्र+दर्भ+आसन+द्विजाः शश्वत् योज्याः। पिण्डादिस्थाः कुशाः, प्रेत+श्राद्धात् विप्रः, चिता+अनलः, नीचे, मन्त्राः, गौः, तुलसी असन्तः। द्विजः शोधितः सन्तः। सर्वदा स+ॐकारान्, होमे वाम+हस्त+हृत् स्वाहा+अन्तान्।४२-४३। मनून् आर्ष+छंदः+ देवता+विनोग+ज्ञः जपेत्। शूद्र+आहृतं द्विज+क्रीतं समित्+दर्भ+अप्+सुम+आदि असत्।४४।

शुभकार्यांत वापरलेले सुस्थितीतील अग्नी, मंत्र, दर्भ, आसन आणि ब्राह्मण यांचा वारंवार उपयोग करावा. पिण्डावर वगैरे टाकलेले दर्भ, एकोद्दिष्ट श्राद्ध जेवलेला ब्राह्मण,(४२) चितेचा अग्नी, नीचाकडचा मंत्र, गाय आणि तुळस हे सर्व अशुभ आहेत. ब्राह्मण संस्कार, प्रायश्चित्त इत्यादींनी शुद्ध होतो. जप, होम इत्यादि सर्व कार्यात मंत्राच्या पूर्वी ॐकार लावून उच्चार करावा. होमाच्या वेळी मंत्राच्या शेवटी स्वाहा लावावे आणि डावा हात हृदयावर धरलेला असावा.४३. *'अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च। योऽध्यापयेद्यजेद्वाऽपि पापीयान्जायते तु सः'* या स्मृतीनुसार (बृहद्देवता ८ः१३६) मंत्रांचा जप करतांना ऋषी, छंद, देवता आणि विनियोग यांचे ज्ञान आवश्यक आहे. समिधा, दर्भ, पाणी, फुले इत्यादी ब्राह्मणांनी स्वतः आणावीत असे धर्मसिंधूंत वचन आहे. ती शूद्राने आणलेली किंवा ब्राह्मणाने विकलेली असतील तर अशुद्ध आहेत.४४.

**अफेनानुच्छिष्टहस्त-नखास्पृष्टामलाम्बु सत् । कुशकाशयवोशीर-गोधूमव्रीहिकुन्दराः ।।४५।।**
**दूर्वामौञ्जस्तृणं दर्भा वर्षामास्वीकृताः शुभाः । मूलतो ब्रह्मविष्णवीशा दर्भे सर्वेऽभितोऽमराः ।।४६।।**
**कर्मोत्तरान्तं प्राक्संस्थं व्यस्तं वा पित्र्यमग्निगम् । याम्यन्तं तद्वदास्यं च ज्ञेयोऽङ्गे वामतः क्रमः ।।४७।।**

अफेन+अनुच्छिष्ट+हस्त+नख+अस्पृष्ट+अमल+अम्बु सत्। कुश+काशय+वोशीर+गोधूम+व्रीहि+कुन्दराः दूर्वा+मौञ्जः+तृणं दर्भाः वर्षा+अमा+स्वीकृताः शुभाः। दर्भे मूलतः ब्रह्म+विष्णु+ईशाः अभिते सर्वे अमराः।४५-४६। कर्म उत्तरान्तं प्राक्+संस्थं व्यस्तं वा। पित्र्यं अग्नि+गं याम्यन्तं तत्+वत् आस्यं च। अङ्गे वामतः क्रमः।४७।

पाणी फेसरहित, उष्टे नसलेले, हात किंवा नख न लागलेले आणि स्वच्छ, कर्मासाठी श्रेष्ठ जाणावे. कुश, कास, जव, वाळा,गहू, साळी, कुन्दा, दूर्वा, मुंज आणि गवत हे दहा दर्भ आहेत. ते श्रावणातील अमावास्येला घतलेले शुभ होत. *'अयातयामास्ते दर्भाः विनियोज्याः पुनः पुनः'* या धर्मसिंधूच्या वचनानुसार ते वर्षभर वापरता येतात. दर्भाच्या मुळाशी ब्रह्मा, मध्ये विष्णू, अग्राला शंकर आणि सभोवती सर्व देवता वास करतात.४५-४६. देवकर्म करताना ते पूर्वेकडे स्थापून उत्तरेला संपवावे किंवा उत्तरेकडे स्थापून पूर्वेला संपवावे आणि पितरांचे कर्म आग्नेयेला आरंभ करून दक्षिणेला संपवावे. देवकर्म करतांना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख असावे आणि पितृकर्माचे वेळी दक्षिणेकडे मुख करावे. अंगाविषयी डावीकडून क्रम असावा. ४७.

**तर्जन्यल्पाधःकराग्र-मध्यादिषु यथाक्रमम् । तीर्थं पित्र्यं कायदैवमाग्नेयं ब्राह्ममुच्यते ।।४८।।**
**पित्रर्षिदेवादानोप-स्पर्शकार्यं चरेत्तु तैः । वामान्वारब्धान्यपाणिः कर्माद्यान्ताम्बुदानयुक् ।।४९।।**
**त्वक्फलकृमिरोमोत्थ-श्वेतासृक्पीतमेचकम् । वासो दग्धं द्विजादेः सद्धौतमस्फाटितं स्वकम् ।।५०।।**
**ब्राह्मे मुहूर्त उत्थाय गणेशब्रह्मविष्णवजान् । देवान्नत्वा गुरून्खेटान्गां सच्छ्लोकांश्च संस्मरेत् ।।५१।।**

तर्जनी+अल्प+अधः+कर+अग्र+मध्य+आदिषु यथाक्रमं पित्र्यं कायं आग्नेयं ब्राह्मं तीर्थं उच्यते।४८। पितृ+ऋषि+देव+आदान+ उपस्पर्श+कार्यं तैः चरेत्। वामान् वा आरब्ध अन्य पाणिः। कर्म आदि+अंत अम्बु+दान+युक्।४९। त्वक्+फल+कृमि+रोम+उत्थ श्वेत+असृक्+पीत+मेचकं वासः द्विज+आदेः । धौतं अदग्धम् अस्फाटितं स्वकम् सत् ।५०। ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय गणेश+ब्रह्म+विष्णु+अजान् देवान् गुरून् खेटान् गां च नत्वा सत्+श्लोकान् च संस्मरेत्।५१।

उजव्या हाताच्या तर्जनीखाली पितृतीर्थ, करंगळीखाली ऋषितीर्थ, हाताच्या अग्रभागी दैवतीर्थ, मध्यभागी आग्नेय तीर्थ आणि करमूलाजवळ ब्राह्मतीर्थ अशी तीर्थे आहेत. त्यांची योजना अनुक्रमे पितृकर्म, ऋषिकर्म, देवकर्म, प्रतिग्रह (दान घेणे) आणि आचमन यासाठी करावी. कर्माच्या आरंभी डाव्या हाताने उजव्या हाताला स्पर्श करावा. कर्माच्या आरंभी आणि शेवटी पाणी द्यावे.४८-४९. झाडाच्या सालीपासून केलेले पांढरे, कापसाचे लाल, रेशमाचे पिवळे व लोकरीचे निळे (काळे) ही वस्त्रे अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना शुभ आहेत. वस्त्र स्वच्छ धुतलेले, न जळलेले, न फाटलेले आणि आपले स्वतःचे शुभ जाणावे. इथे आचारधर्माची परिभाषा पूर्ण झाली.५०.

ब्राह्म मुहूर्त म्हणजे चिंतनाला योग्य असा रात्रीचा चौथा प्रहर. त्या वेळीं उठून गणेश, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आदि देवांना, तसेच माता, पिता, गुरू इत्यादि वडीलधाऱ्यांना, सूर्यादि ग्रहांना, भूमीला आणि गोमातेला नमस्कार करून धर्मादि पुण्यश्लोकांचे स्मरण करावे.५१.

**ग्रामाद्बहिस्तु नैर्ऋत्यां सद्द्रुम्बध्वादि वर्जिते । स्थलेम्बु दूरात्संस्थाप्य यतनासाक्षिवाक् तृणे ।।५२।।**
**उदङ्मुखोऽन्यथा नक्तमासीनो वस्त्रमस्तकः । आर्षसूत्रं दक्षकर्णे कृत्वा मूत्रविशौ त्यजेत् ।।५३।।**
**लिङ्गं सहाद्भिरप्स्थार्द्र-धात्रीमात्रमृदा गुदम् । त्रिर्वामो दशवारं च करः शोध्याः कराङ्घ्रयः ।।५४।।**
**प्रत्येकं सप्तवारं द्वि-गुणं वीर्येऽर्धमन्यके । वर्णिवानप्रस्थभिक्षोः शौचं द्वित्रिचतुर्गुणम् ।।५५।।**

ग्रामात् बहिः नैर्ऋत्यां सत्+द्रु+अम्बु+अध्व+आदि वर्जिते स्थले, अम्बु दूरात् संस्थाप्य यत+नासा+अक्षि+वाक् उदक्+मुखः नक्तं अन्यथा वस्त्र+मस्तकः आर्षसूत्रं दक्ष+कर्णे कृत्वा मूत्र+विशौ त्यजेत्।५२-५३। अप्+स्थ+आर्द्र+धात्री+मात्र मृदा अद्भिः सह लिङ्गं, गुदं त्रिः, वामः करः दशवारं च शोध्याः। कर+अङ्घ्रयः प्रत्येकं सप्तवारम्। वीर्ये द्विगुणम्। अन्यके अर्धम्। वर्णि+वानप्रस्थ+भिक्षोः द्वि+त्रि+चतुः+गुणं शौचम्।५४-५५।

नंतर गावाच्या बाहेर नैर्ऋत्य दिशेला जाऊन वड, पिंपळ आदि पुण्यवृक्षांपासून, (नदी, तलाव इत्यादि) जलापासून तसेच वाटेपासून दूर जागेवर पाणी दूर ठेवावे; डोक्यावरून नाकावर वस्त्र घेऊन, दृष्टी स्थिर करून, इकडे-तिकडे न पाहता मौन धारण करावे; गवत पसरावे; उत्तरेकडे (रात्री दक्षिणेकडे) तोंड करून, वस्त्र डोईला गुंडाळून, जानवे उजव्या कानाला अडकवून मलमूत्रविसर्जन करावे.५२-५३.

ओल्या आवळ्याएवढ्या ओल्या मातीच्या गोळ्यांनी आणि पाण्याने एक वेळा लिंग, तीन वेळा गुद, दहा वेळा डावा हात, उजवा हात आणि दोन्ही पाय प्रत्येकी सात वेळा स्वच्छ करावेत. वीर्यपातानंतर हेच शौच दुप्पट करावे; मूत्रोत्सर्गानंतर निम्मे करावे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी यांना शौचाचे प्रमाण दुप्पट, तिप्पट आणि चौपट सांगितले आहे.५४-५५.

**अर्धार्धार्धं निशाशक्ति-मार्गेष्वज्ञाबलासु तु । गन्धलेपान्तावधि स्याद् गण्डूषान्वामतस्त्यजेत् ।।५६।।**
**द्विजो द्वादश चान्योऽल्पान्तर्जन्यास्यं न शोधयेत् । क्षीरिकण्टकिवृक्षाम्र-निम्बापामार्गदारुणा ।।५७।।**
**द्वादशाङ्गुलमात्रेण द्विजोऽन्योऽल्पेन मन्त्रवत्। शुद्धास्योऽब्गोविशा प्रातः स्नायान्मध्यन्दिनेऽम्मृदा ।।५८।।**
**भिक्षुर्व्रती त्रिकालं न चिरण्टी शिरसा सदा । शीतैः शीताप्सम्पुटितोष्णकैर्वाब्लिङ्गमन्त्रितैः ।।५९।।**

अर्ध+अर्ध+अर्धं निशा+अशक्ति+मार्गेषु। अज्ञ+अबलासु गन्ध+लेप+अन्त+अवधि स्यात्। द्विजो गण्डूषान् वामतः त्यजेत्, अन्यो अल्पान्। तर्जन्या आस्यं न शोधयेत्। क्षीरि+कण्टकिवृक्ष+आम्र+निम्ब+अपामार्ग+दारुणा द्वादश+अंगुल+मात्रेण द्विजः अन्यः अल्पेन मन्त्रवत् शुद्ध+आस्यः प्रातः अप्+गो+विशा स्नायान्। मध्यन्दिने मृदा।५६-५८। भिक्षुः व्रती त्रिकालं (स्नायात्)। चिरण्टी सदा शिरसा न स्नायात्। शीतैः शीत+अप्+सम्पुष्टित+उष्ण+कैः वा अप्+लिङ्ग+मन्त्रितैः (स्नायात्)।५९।

रात्रीच्या वेळी शौच अर्धे करावे, अशक्तांनी त्याच्या अर्धे आणि प्रवासात त्याच्याही अर्धे करावे. लहान मुले आणि स्त्रिया यांच्यासाठी शौचाची मात्रा केवळ गंध आणि लेप जाईपर्यंतच सांगितली आहे. चुळा डावीकडे टाकाव्यात. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी दहा, वैश्यांनी आठ तर शूद्रांनी चार चुळा भराव्यात. तर्जनीने दात घासू नयेत. पिंपळ, बाभळ, आंबा, निम्ब, आघाडा यांच्या काडीने दात घासावे. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी आठ आणि वैश्यांनी आठ अंगुलीच्या सालीसह ओल्या काष्ठाने '*मुखदुर्गन्धि*' या मंत्राने दात घासून जीभ रगडून इत्यादि प्रकारे तोंड धुवावे. नंतर प्रातःस्नान गोमय आणि पाण्याने करावे. मध्याह्न काळी मृत्तिकास्नान करावे.५६-५८.

कुटीचक आणि बहूदक संन्याशांनी, वानप्रस्थांनी तसेच चांद्रायणादि व्रत करणाऱ्यानी त्रिकाल स्नान करावे. हंस संन्याशांना एकच वेळ स्नान विहित आहे. सुवासिनींनी नेहमी डोक्यावरून स्नान करू नये. थंड पाण्याने किंवा '*आपोहिष्ठा*' इत्यादि मंत्रांनी मंतरलेल्या संपुष्टित गरम पाण्याने स्नान करावे. संपुष्टित म्हणजे आधी थोडे थंड पाणी घालून त्यानंतर कढत पाणी आणि पुनः वरून थंड पाणी मिसळणे.५९.

**धाम्न्याचमनसङ्कल्प-मार्ष्टितृप्त्यघहारि नो । दीपाल्युत्सवमाङ्गल्याऽब्दाद्येऽभ्यङ्गं सदैच्छिकम् ।।६०।।**
**अनिन्द्याहेऽधवाभिक्ष्वोर्नेदं स्नायान्न शीतकैः । माङ्गल्येऽर्भोत्पत्तिपर्व-क्रान्तिश्राद्धेषु नोष्णकैः ।।६१।।**
**स्नायाद्वान्त्यशुचिस्पर्श-दुःस्वप्नरतिदुर्गमे । नद्यां प्रवाहाभिमुखो वरुणं प्रार्थ्य मन्त्रवत् ।।६२।।**
**स्नात्वा लोड्याम्ब्वम्बुमन्त्रैः स्वमुन्मार्ज्याघमर्षणम् । कृत्वा स्नात्वा तर्पयित्वा जले देवानृषीन्पितॄन् ।।६३।।**
**निष्पीड्योदग्दशं वासः शोधिताङ्गो गृहं व्रजेत् । स्रवत्यात्मा सरन्ध्रोऽतः प्रातःस्नानं विशोधनम् ।।६४।।**

धाम्नि आचमन+आचमन+सङ्कल्प+मार्ष्टि+तृप्ति+अघहारि नो। दीपालि+उत्सवे+माङ्गल्ये+अब्दाद्ये अभ्यङ्गं (कार्यम्)। सदा अनिन्द्य+अहे ऐच्छिकम्। अधवा+भिक्षोः इदं न। माङ्गल्ये शीत+कैः न स्नायात्। अर्भ+उत्पत्ति+पर्व+क्रान्ति+श्राद्धेषु उष्ण+कैः न।६०-६१। वान्ति+अशुचि+स्पर्श+दुःस्वप्न+रति+दुर्गमे स्नायात्। नद्यां प्रवाह+अभिमुखः मन्त्रवत् वरुणं प्रार्थ्य स्नात्वा अम्बु आलोड्य अम्बु+मन्त्रैः स्वं उन्मार्ज्य, अघमर्षणं कृत्वा, जले स्नात्वा देवान् ऋषीन् पितन् तर्पयित्वा, वासः उदक्+दशं निष्पीड्य, शोधित+अङ्गः गृहं व्रजेत्। सरन्ध्रः आत्मा स्रवति। अतः प्रातः+स्नानं वि+शोधनम्।६२-६४।

घरी स्नान करताना आचमन, संकल्प, मार्जन, तर्पण आणि अघमर्षण करू नये. दिवाळीच्या सणांत, विवाहादि मंगलकार्याच्या दिवशी, पाडव्याला अभ्यंग स्नान करावे. इतर दिवशी, षष्ठी, अष्टमी आणि चतुर्दशी सोडून ते ऐच्छिक आहे. विधवा आणि संन्यासी यांना अभ्यंगस्नान वर्ज्य आहे. मंगलकार्यादिवशी थंड पाण्याने स्नान करू नये. पुत्रजन्म, पर्वकाल, संक्रान्ती आणि श्राद्ध या दिवशी गरम पाण्याने स्नान करू नये.६०-६१. उलटी झाल्यावर, अपवित्र व्यक्तीचा स्पर्श झाल्यावर, दुःस्वप्नानंतर, मैथुनोत्तर, स्मशानादि स्थानी गेल्यावर स्नान करावे. नदीत स्नान करताना प्रवाहाकडे तोंड करून वरुणाची प्रार्थना करून *'हिरण्यशृंग'* इत्यादि मंत्रांनी स्नान करावे. पाणी लोटून *'आपोहिष्ठा'*दि मंत्रांनी स्वतःवर मार्जन करावे. मग अघमर्षण करून स्नान करावे आणि पाण्यातच देव, ऋषी आणि पितर यांचे तर्पण करावे. मग वस्त्राच्या दशा उत्तरेकडे करून ते पिळावे. त्या वस्त्राने अंग कोरडे करून घरी यावे. हा देह नऊ रंध्रांतून स्रवत असतो. त्यासाठी प्रातःस्नान हे विशेष शोधन आहे.६२-६४.

**त्रिसप्तद्वादशाहं चेत् सन्ध्यास्नानाग्निवर्जितः । द्विजोऽपि शूद्रोऽशक्तश्चेन् मान्त्राद्यन्यतमं चरेत् ।।६५।।**
**हृद्यभौमाग्नेयमान्त्रानिलदिव्यैः शुचिर्हरेः । ध्यानमृद्भस्माम्मनुगो-रजोवर्षात्मकाप्लवैः ।।६६।।**
**मेधाऽलोलुपतारोग्य-रूपतेजोयशोबलम् । शौर्यदुःस्वप्नहृत्यायुर्लभेत्स्नातोऽन्यथापरम् ।।६७।।**
**स्नात्वा मृद्भस्म हुत्वाङ्गे धार्यमभ्यर्च्य चन्दनम् । केशवाद्यैर्द्वादशभिः सिते पक्षेऽसिते परैः ।।६८।।**

त्रि+सप्त+द्वादश+अहं सन्ध्या+स्नान+अग्नि+वर्जितः चेत् द्विजः अपि शूद्रः (भवेत्)। अशक्तः चेत् मान्त्रादि अन्यतमं चरेत्।६५। हृद्य+भौम+आग्नेय+मान्त्र+अनिल+दिव्यैः हरेः ध्यानं+मृत्+भस्म+ अप्+मनु+गोरजः+वर्षात्मक +आप्लवैः शुचिः।६६। स्नातः मेधा, अलोलुपता, आरोग्य, रूप, तेजः, यशः, बलं, शौर्य, दुःस्वप्न+हृति, आयुः लभेत्। अन्यथा अपरम्।६७। स्नात्वा मृत्, हुत्वा भस्म, अभ्यर्च्य चन्दनं अङ्गे धार्यम्। सिते पक्षे केशवाद्यैः द्वादशभिः, असिते परैः।६८।

तीन दिवस संध्या, सात दिवस स्नान आणि बारा दिवस आधान अग्नी टाकल्यास ब्राह्मणसुद्धा शूद्र होतो. स्नान करण्याची शक्ती नसेल तर मंत्रस्नानादि एखादा पर्याय अवलंबावा.६५. हे पर्याय असे - हरीच्या ध्यानाने **मानसिक**, द्वारावती वा अन्य मृत्तिकेच्या लेपाने **पार्थिव** स्नान, भस्मलेपनाने **आग्नेय** स्नान, '*आपोहिष्ठा*'दि मंत्रांनी मंत्रस्नान, गोधूलीयुक्त वारा अंगावर घेतल्याने वायुस्नान आणि ऊन्हात पडणाऱ्या पावसात भिजणे हे **दिव्य** स्नान, यांनी शुद्धता येते.६६. स्नान केल्याने, बुद्धीची धारणाशक्ती, अलोलुपता, आरोग्य, सुरूपता, कांती, कीर्ती, बळ, दुःस्वप्ननाश आणि दीर्घायुष्य लाभते. स्नान न करणाऱ्याला याच्या उलट फळे - बुद्धिमांद्य, लंपटपणा, रोग, कुरूपता, निस्तेज कांती, अपकीर्ती, बलहीनता, दुःस्वप्न आणि अल्पायुष्य मिळते.६७. स्नानानंतर मृत्तिका (गोपीचंदन), होमानंतर भस्म आणि पूजेनंतर चंदन लावावे. शुक्ल पक्षात केशव, नारायण इत्यादि बारा नावांनी व कृष्ण पक्षात संकर्षण, वासुदेव इत्यादि पुढच्या बारा नावांनी गोपीचंदनादि धारण करावे.६८.

**ललाटोदरहृत्कण्ठ-दक्षकुक्षिभुजश्रुतिः । कुक्षिदोः श्रुतिपृष्ठाङ्ग-ककुन्मूलेन कं त्विति ।।६९।।**
**मृद्गन्धितिलकैरङ्क्या भस्मपुण्ड्रैः षडर्णतः । मृताशौचे न गन्धात्र माङ्गल्ये भस्म धारयेत् ।।७०।।**
**गयाश्राद्धाधानपट्ट-प्रेतकृत्योत्तरीयकम् । पादुका रौप्यमुद्रा न क्षौरं जीवत्पिता भजेत् ।।७१।।**
**रौप्यहैमीखड्गमुद्रा-वत्तर्जन्यल्पकाङ्गुलिः । साग्रागर्भचतुर्दर्भ-पवित्रानामिकोऽपि वा ।।७२।।**

ललाट, उदर, हृत्, कण्ठ, दक्ष+कुक्षिः+भुजः+श्रुतिः, कुक्षि+दोः श्रुति, पृष्ठ+अङ्ग, ककुत्+मूलेन कं तु इति मृत्+गन्धि+तिलकैः अंक्या। भस्म पुण्ड्रैः षडर्णतः। मृत+अशौचे गन्धात् न। माङ्गल्ये भस्म न धारयेत्।६९-७०। गयाश्राद्ध, आधान, पट्ट, प्रेतकृत्य, उत्तरीयकं, पादुका, रौप्यमुद्रा, क्षौरं जीवत्+पिता न भजेत्।७१। रौप्य+हैमी+खड्ग+मुद्रावत् तर्जनी+अल्पका+अङ्गुलिः वा स+अग्र+अगर्भ+चतुर्दर्भ+पवित्र+अनामिकः अपि।७२।

कपाळ, पोट, छाती, गळा, उजवी कूस, बाहू आणि कान, डावी कूस, बाहू आणि कान, पाठीवर, पाठीच्या वरच्या भागावर वरील बारा नावांनी लावून *'नमो नारायणाय'* मंत्राने मस्तकावर लावावेत. गोपीचंदन आणि गन्ध यांचे उभे टिळे लावावेत. भस्म तीन बोटांनी *'नमः शिवाय'* मन्त्राने आडवे त्रिपुण्ड्र लावावेत. अशौचात गन्ध लावू नये आणि मंगलकार्यांत भस्म लावू नये.६९-७०.

गयाश्राद्ध, अग्निहोत्र, श्रौतकर्म इत्यादि, योगपट्ट (संन्यासकर्मांतील), उत्तरक्रिया, उत्तरीय वस्त्र, खडावा, चांदीची अंगठी आणि क्षौर ही पिता जिवंत असेल तर वर्ज्य आहेत.७१. तर्जनीत चांदीची, अनामिकेत सोन्याची आणि करंगळीत पोलादाची अशा अंगठ्या धारण कराव्यात; किंवा टोकासह गर्भरहित चार दर्भाची दोन पवित्रे दोन्ही अनामिकांत घालावी.७२.

**मुक्ताङ्गुष्ठाल्पगोकर्णाकृतिहस्तेन कं त्रिभिः । केशवाद्यैः प्राश्य हस्तौ द्वाभ्यां प्रक्षाल्य चाधरौ ।।७३।।**
**द्वाभ्यां प्रोक्ष्यास्यमेकैकात् करं पादौ शिरोऽपरैः । आस्यं नासेक्षिणी कर्णौ नाभिं हृत्के भुजौ स्पृशेत् ।।७४।।**
**नासां साङ्गुष्ठतर्जन्याङ्गुष्ठेनास्यं च दृक्श्रुती । सानामिकेन साल्पेन नाभिं करतलाग्रतः ।।७५।।**
**हृद्वाहून्कं च सर्वाभिः स्पृशेदाचमनं त्विदम् । त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः स्पृशेत्कर्णमसंभवे ।।७६।।**

मुक्त+अङ्गुष्ठ+अल्प+गोकर्ण+आकृति+हस्तेन केशव+आद्यैः कं प्राश्य, द्वाभ्यां हस्तौ प्रक्षाल्य च द्वाभ्यां अधरौ प्रक्षाल्य, एक+एकात् आस्यं, (वाम)करं, अपरैः पादौ, शिरः, आस्यं, नासा, अक्षिणी, कर्णौ, नाभिं, हृत्, के, भुजौ स्पृशेत्।७३-७४। स+अङ्गुष्ठ+तर्जन्या नासां, अङ्गुष्ठेन आस्यं च, स+अनामिकेन स+अल्पेन दृक्+श्रुती, करतल+अग्रतः नाभिं हृत्, बाहुं च कं सर्वाभिः स्पृशेत्। इदं तु आचमनम्। असंभवे त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः कर्णं स्पृशेत्।७५-७६।

अंगठा आणि करंगळी मोकळी सोडून मधली तीन बोटे एकत्र धरून तळहात गाईच्या कानाप्रमाणे सखल करावा. त्यात पळीभर पाणी घेऊन (उडदाचा दाणा बुडेल इतके. आचमनाच्या वेळी उणे अधिक जलपान हे सुरापानासमान मानले आहे.) ते देवतीर्थाने (मनगटावरून) *'केशवाय स्वाहा'*, *'नारायणाय स्वाहा'* आणि *'माधवाय स्वाहा'* ह्या नामांनी तीन वेळा प्यावे. मग *'गोविंदाय नमः'* या नामाने उजवा व *'विष्णवे नमः'* या नामाने डावा हात धुवावा. मग *'मधुसूदनाय नमः'* व *'त्रिविक्रमाय नमः'* ह्या दोन नामांनी ओठांना पाणी लावावे. *'श्रीधराय नमः'* या नामाने पुन्हा हात धुवावा. *'हृषीकेशाय नमः'* आणि *'पद्मनाभाय नमः'* ह्या नावांनी पायांना, *'दामोदराय नमः'* नावाने डोक्याला, *'संकर्षणाय नमः'* म्हणत मुखाला, *'वासुदेवाय नमः'* व *'प्रद्युम्नाय नमः'* या नावांनी नाकपुड्यांना, *'अनिरुद्धाय नमः'* व *'पुरुषोत्तमाय नमः'* यांनी डोळ्यांना, *'अधोक्षजाय नमः'* व *'नरसिंहाय नमः'* यांनी कानांना, *'अच्युताय नमः'* याने बेंबीला, *'जनार्दनाय नमः'* या नावाने हृदयाला, *'उपेन्द्राय नमः'* म्हणून डोक्याला, *'हरये नमः'* आणि *'श्रीकृष्णाय नमः'* या नावांनी बाहूंना स्पर्श करावा. त्यानंतर अंगठा व तर्जनी यांनी नाकाला, अंगठ्याने मुखाला, अंगठा व अनामिकेनी डोळ्यांना, अंगठा व करंगळी यांनी कानांना, हाताच्या तळव्याने नाभीला, हाताच्या टोकाने हृदयाला आणि बाहूंना तसेच सर्व बोटांनी मस्तकाला स्पर्श करावा. म्हणजे आचमन पूर्ण होते. एवढे सगळे शक्य नसेल तर वरीलप्रमाणे तीन वेळा पाणी पिऊन हात धुतल्यावर कानाला स्पर्श करावा.७३-७६.

**माषमज्जनमात्राम्बु-पानेऽथ द्विरुपस्पृशेत् । मूत्राद्युत्सर्गशुद्ध्यूर्ध्वं स्नाने दाने सुरार्चने ॥७७॥**
**प्राक्परे कर्मसन्ध्यासु सुप्ते वासोधृतौ क्षुते । कासश्वासागमादानाध्ययनाशुद्धभाषणे ॥७८॥**
**श्मशानचत्वारगतौ पच्छौचे स्वाऽन्ययोः कृते । आचामेद्धीनसंभाषे स्त्रीशूद्रोच्छिष्टभाषणे ॥७९॥**
**रक्ताश्रुपातेऽसुयामे जलोत्तारेऽभिवादने । उच्छिष्टस्पर्शेऽपाने च याते कर्णं स्पृशेत्तु वा ॥८०॥**
**विप्रदक्षश्रुतौ देव-पाशीनेन्द्वग्न्यबाशुगाः । सन्ध्याज्ञानाद्भवेच्छूद्रः सन्ध्याहीनोऽशुचिर्द्विजः ॥८१॥**

पाने माष+मज्जन+मात्र अम्बु द्विः उपस्पृशेत्। मूत्र+आदि+उत्सर्ग+शुद्धि+ऊर्ध्वं; स्नाने, दाने, सुर+अर्चने, कर्म+सन्ध्यासु प्राक्, परे। सुप्ते, वास+उधृतौ, क्षुते, कास+श्वास+आगम+आदान+अध्ययन+अशुद्ध+भाषणे, श्मशान+चत्वार+गतौ, स्व+अन्ययोः कृते पत्+शौचे, हीन+संभाषे, स्त्री+शूद्र+उच्छिष्ट+भाषणे आचमेत्। रक्त+अश्रु+पाते, असुयामे, जल+उत्तारे, अभिवादने, उच्छिष्ट+स्पर्शे, अपाने याते च (आचमेत्) वा कर्णं तु स्पृशेत्।७७-८०। विप्र+दक्ष+श्रुतौ देवाः पाशी+इन+इन्दु+अग्नि+अप्+आशुगाः। द्विजः सन्ध्या+अज्ञानात् शूद्रः भवेत्। सन्ध्याहीनः अशुचिः।८१।

आचमनाच्या वेळी एक उडीद बुडेल इतकेच पाणी प्यावे. आचमन नेहमी दोन वेळा करावे. मूत्रादि उत्सर्गाच्या शुद्धीनंतर द्विराचमन करावे. स्नान, देवपूजा, देव-पितरादि कर्म आणि संध्या यांच्या पूर्वी आणि नंतर द्विराचमन करावे. झोपून उठल्यावर, वस्त्र नेसल्यावर, शिंक आल्यावर, खोकला किंवा दम लागल्यावर, अध्ययनानंतर, अशुची व्यक्तीशी भाषण केल्यावर, श्मशान किंवा चौरस्त्यावर गेल्यास, आपण स्वतः किंवा इतरांनी आपले पाय धुतल्यावर, हीनाशी संभाषण केल्यावर, स्त्री, शूद्र किंवा उष्टा (जेवणानंतर न आंचवलेला) यांच्याशी बोलल्यावर दोन वेळा आचमन करावे. रक्त किंवा अश्रू यांचा स्राव झाल्यावर, प्राणायामानंतर, पाण्यातून पोहून आल्यावर, अभिवादन केल्यावर, उष्ट्याचा स्पर्श झाल्यावर किंवा अपान वायू गेल्यावर आचमन करावे. किंवा कर्णस्पर्श तरी करावा.७७-८०. ब्राह्मणाच्या उजव्या कानात वरुण, सूर्य, चंद्र, अग्नी, जल, आणि वायू या देवता वसतात. ज्याला संध्या येत नाही असा ब्राह्मणही शूद्र होतो. संध्या न केलेला ब्राह्मण अपवित्र असतो.८१.

**विना संध्यावन्दनेन नाधिकारोऽन्यकर्मसु । सम्यग्ब्रह्मात्र ध्यायन्ति विप्राः सन्ध्या ततः स्मृता ।।८२।।**
**भाढ्या भहीनार्कयुक्ता तूत्तमा मध्यमाधमा । प्रातःसंध्याऽपरा तद्वत् सार्कार्कोना च भान्विता ।।८३।।**
**त्रिनाड्यधस्तामकृत्वा चतुर्थार्घ्यं प्रदापयेत् । अध्यर्धयामादासायं संध्या मध्याह्निकी स्मृता ।।८४।।**
**धृत्वानामिकाङ्गुष्ठैर् यतिवर्णी च पञ्चभिः । अन्यो नासां शनैर्वायुं सव्ययापूर्य शक्तितः ।।८५।।**
**प्रणवव्याहृतीः सप्त गायत्रीं शिरसा सह । त्रिर्जपन्कुम्भितं मन्दं दक्षनाड्या विरेचयेत् ।।८६।।**

सन्ध्या+वन्दनेन विना अन्य+कर्मसु अधिकारः न। अत्र विप्राः सम्यक् ब्रह्म ध्यायन्ति ततः सन्ध्या स्मृता।८२। प्रातः+सन्ध्या भा+आढ्या उत्तमा, भ+हीना मध्यमा, अर्क+युक्ता तु अधमा। अपरा तद्वत् स+अर्का (उत्तमा), अर्क+ऊना (मध्यमा) च भ+अन्विता (अधमा)।८३। त्रि+नाडी+अधः तां अकृत्वा चतुर्थ अर्घ्यं प्रदापयेत्। अधि+अर्ध+यामात् आसायं मध्याह्निकी संध्या स्मृता।८४। यति+वर्णी अल्पा+अनामिका+अङ्गुष्ठैः, अन्यो पञ्चभिः नासां धृत्वा सव्यया शनैः आपूर्य प्रणव सप्त व्याहृतीः गायत्रीं शिरसा सह कुम्भितः त्रिः जपन् मन्दं दक्ष+नाड्या विरेचयेत्।८५-८६।

संध्यावन्दन केल्याशिवाय इतर कर्मांचा अधिकार प्राप्त होत नाही. ब्राह्मण ब्रह्माचे सम्यक् (**सं**) ध्यान (**ध्या**) करतात म्हणून तिला संध्या म्हणतात.८२. आकाशात नक्षत्रे दिसत असतानाच केलेली प्रातःसंध्या उत्तम, नक्षत्रे मावळली असता केलेली मध्यम आणि सूर्योदयानंतर केलेली कनिष्ठ जाणावी. त्याचप्रमाणे सायंसंध्या सूर्य मावळायच्या आधी उत्तम, तो मावळल्यावर मध्यम आणि तारे उगवल्यावर कनिष्ठ जाणावी.८३. संध्येला तीन घटकांपेक्षा अधिक विलंब झाला तर प्रायश्चितासाठी चौथे अर्घ्य द्यावे. मध्याह्न संध्येचा काळ दीड प्रहर दिवसापासून संध्याकाळपर्यंत सांगितला आहे. प्रातः, संगव, मध्याह्न, पराह्न आणि सायाह्न असे दिवसाचे पाच मुख्य भाग आहेत.८४. संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी करंगळी, अनामिका आणि अंगठा यांनी आणि गृहस्थ-वानप्रस्थांनी पाची बोटांनी नाक धरून अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून, डाव्या नाकपुडीने (इडा) हळूहळू पूरक करावा (श्वास आत घ्यावा). मग हनुवटी छातीला टेकवीत

**कार्योऽन्यथासुयामान्यो मूलबन्धोऽत्र सत्तमः । जालन्धरोड्डियाणाख्यौ कुम्भके रेचके हितौ ।।८७।।**

अन्यः असुयामः अन्यथा कार्यः। अत्र मूलबन्धः सत्तमः। जालन्धर+उड्डियाण+आख्यौ कुम्भके रेचके हितौ।८७।

कुंभक करून कार, सात व्याहृति गायत्री आणि शिरस यांचा तीन वेळा जप करावा आणि मग उजव्या नाकपुडीने श्वास उड्ड्याणबंध करून (पोट आत ओढून) हळूहळू सोडावा (रेचक). पूरकाच्या दुप्पट रेचकाचा काळ सांगितला आहे. अधिक वेगाने रेचक केल्यास बलहानी होऊ शकते.८५-८६.

दुसरा प्राणायाम करायचा असेल तर उलटा करावा. म्हणजे उजव्या नाकपुडीने (पिंगलेने) पूरक करून इडेने रेचक करावा. (हठयोगप्रदीपिका २:१०). कुम्भक करताना जालन्धर बंध चांगला तर रेचक करताना उड्डियाण बंध चांगला. हठयोगप्रदीपिकेत (३:७१) सांगितल्याप्रमाणे शिरांतील जालाचे बंधन करून अधोगामी नभोजल अडवतो तो जालंधर बंध. योगतारावलीत भ.पू.पा. शंकराचार्यांनी ह्या तीनही बंधांचे वर्णन असे केले आहे. गळा, पोट आणि गुदद्वार या तीन ठिकाणी जालंधर, उड्डियाण आणि मूल ह्या बंधत्रयांची ओळख पटली तर कालपाशाचा बंध कसा पडेल? उड्डियाण, जालंधर आणि मूल या बंधांनी जागलेली सर्पिणी पश्चिममुखांत प्रविष्ट झाली की वायूचे येणे-जाणे थांबते. (*जालंधरोणड्उानमूलबन्धान् जल्पन्ति कण्ठोदरपायुमूले। बन्धत्रयेऽस्मिन्परिचीयमाने बन्धः कुतो दारुणकालपाशैः।।१।। उड्याणजालन्धरमूलबन्धैरुन्निद्रितायामुरगाङ्गनायां। प्रत्यङ्मुखत्वात्प्रविशन्सुषुम्णां गमागमौ मुञ्चति गन्धवाहः।।२।।*)

अशा प्राणाचा निरोध केल्यावर प्रथम *ॐकार आणि भूः* इत्यादि व्याहृतींचा उच्चार करताना त्यांच्या भूः म्हणजे सर्व पदार्थांनी युक्त असा हा भूलोक आणि *ॐ* म्हणजे ब्रह्म असा विवेक आहे. *भूः*, *भुवः*, स्वः इत्यादि लोकांना ब्रह्मदृष्टीने पाहायचे आहे. ब्रह्म हे सर्वांत श्रेष्ठ असून भूर्भुवः इत्यादींना त्या पातळीला नेऊन ध्यान करावे (*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्*) असे ब्रह्मसूत्र (४:१:५) आहे.

**प्राणायामोऽघनिघ्नोऽयं कार्यः सर्वेषु कर्मसु । ग्रामाद्बहिः स्याद्द्विगुणं नद्यां शतगुणं फलम् ।।८८।।**
**तीर्थे सहस्रं सन्ध्यायामनन्तं सान्ध्यकर्मजम् । बहिःसंध्या सुरापानानृतोक्त्याद्यघहारिणी ।।८९।।**
**संध्यामुपासिष्य इति संकल्प्यादाय मार्जयेत् । गोकर्णाकृतिताम्रादि-पात्रे वामकरेऽप्यपः ।।९०।।**
**वरान्तैर्नान्तैः सथान्तैः क्रमात्के पादयोर्हृदि । आपोहिष्ठेति पच्छोपः प्रातर्मध्यन्दिने निशि ।।९१।।**
**सूर्यश्चापः पुनन्त्वग्निश्चेति प्राश्य ह्युपस्पृशेत् । सोङ्कारव्याहृत्योङ्कारयुग्देव्यप्सूक्ततो द्विजः ।।९२।।**

अयं अघ+निघ्नः प्राणायामः सर्वेषु कर्मसु कार्यः। ग्रामात् बहिः द्विगुणं फलं, नद्यां शतगुणं, तीर्थे सहस्रम् गङ्गायां अनन्तं सान्ध्य+कर्म+जं फलं स्यात्। बहिः+सन्ध्या सुरा+पान+अनृत+उक्ति+आदि+अघ+हारिणी।८८-८९। संध्यां उपासिष्य इति सङ्कल्प्य गोकर्णाकृति ताम्रादि पात्रे, वामकरे वा अपः आदाय मार्जयेत्।९०। आपोहिष्ठा इति पत्+शः क्रमात् वः+अन्तैः के, न+अन्तैः पादयोः 'स'+'थ'+अन्तैः हृदि अपः मार्जयेत्।९१। प्रातः 'सूर्यश्च' मध्यन्दिने 'आपः पुनन्तु' निशि 'अग्निश्च' इति आपः प्राश्य हि उपस्पृशेत्।९२।

हा पापनाशक प्राणायाम सर्वच कर्मांत अवश्यमेव करावा. त्यानंतर आचमन किंवा श्रोतृस्पर्श करावा. संध्येचे फळ गावापेक्षा गावाबाहेर - जलाशयादि स्थानी दुप्पट, तर नदीकाठी शतपट मिळते.८८. संध्याकर्माचे फल तीर्थस्थानी हजारपट तर गंगेत अनंतपट सांगितले आहे. बाहेर केलेल्या संध्येने सुरापान, असत्य भाषण इत्यादि पापांचा परिहार करते.८९. '*संध्यां उपासिष्ये*' असा संकल्प करून, गाईच्या कानाच्या आकाराच्या तांबे, चांदी इत्यादीच्या पात्रात किंवा डाव्या हातात पाणी घेऊन मार्जन करावे.९०. सकाळ, दुपार आणि सायंकाळी आपोहिष्ठादि तीन ऋचांच्या पादांनी पादाचे अंतिम अक्षर '*वः*' असेल तर डोक्यावर, '*न*' असेल पायांवर आणि '*स*' किंवा '*थ*' असेल छातीवर क्रमशः पाणी शिंपडून मार्जन करावे. मग प्रातःसंध्येत '*सूर्यश्च*', माध्याह्न संध्येत '*आपः पुनन्तु*' आणि सायंसंध्येत '*अग्निश्च*' या मंत्रांनी पाणी पिऊन आचमन करावे. या मंत्राचमनानंतर ॐकारासहित सात व्याहृती आणि ॐकारसहित गायत्री तसेच आपोहिष्ठादि नऊ ऋचांनी मस्तकावर मार्जन करावे.९१-९२.

**मार्जयेत्प्रतिमंत्रं के ऋतं चेति तृचान्तरे । निःश्वास्याघनरं स्मृत्वा दक्षनासापुटेन तं ।।९३।।**
**बहिर्निःसार्य हस्तेऽप्सु पतितं नावलोकितं । क्षिप्त्वा क्षितौ वामभाग आचम्याप्पूरिताञ्जलिः ।।९४।।**
**गोशृङ्गमात्रमुद्धृत्याञ्जलिं व्यङ्गुष्ठतर्जनीम् । तिष्ठन्ध्यायन्संमुखोऽर्कं देव्यार्घ्यं त्रिर्निवेदयेत् ।।९५।।**
**असावादित्यो ब्रह्मेति ध्यात्वासिच्य प्रदक्षिणम् । परीत्याचामेन्मध्याह्ने नतोऽर्घ्ये हंस इत्यृचा ।।९६।।**
**जपेद्गृहाद्बहिर्द्विघ्नं त्रिघ्नं नद्यां शतं फलम् । गोष्ठे वनेऽग्निहोत्रे च हरहर्यग्रतोऽमिति ।।९७।।**

स+कार+व्याहृति+ॐकार+युक्+देवी अप्+सूक्ततः द्विजः प्रतिमंत्रं के मार्जयेत्। 'ऋतं च' इति ऋचा अंतरे निःश्वास्य अघनरं स्मृत्वा तं दक्ष+नासा+पुटेन बहिः निःसार्य हस्ते अप्सु पतितं न अवलोकितं वामभागे क्षितौ क्षिप्त्वा आचम्य अप्+पूरित+अञ्जलिः...।९३-९४। संमुखः तिष्ठन् अर्कं ध्यायन् वि+अङ्गुष्ठ+तर्जनीं अञ्जलिं गो+शंङ्ग+मात्र उद्धृत्य देव्या अर्घ्यं त्रिः निवेदयेत्।९५। 'असावादित्यो ब्रह्म' इति प्रदक्षिणम् परीत्य आसिच्य आचामेत्। मध्याह्ने अर्घ्ये नतः 'हंस' इति ऋचा (अर्घ्यं दद्यात्)।९६। जपे गृहात् बहिः द्विघ्नं, नद्यां त्रिघ्नं, गोष्ठे शतगुणं, वने, अग्निहोत्रे च हर+हरि+अग्रतः अमिति।९७।

**अघमर्षण -** 'ऋतं चेति' या तीन ऋचांनी आपल्या हातातले पाणी हुंगून पापपुरुषाचे स्मरण करावे आणि उजव्या नाकपुडीने त्याचे बाहेर हातांतल्या पाण्यांत निःसारण करावे आणि ते पाणी न पाहता डाव्या बाजूला जमिनीवर टाकावे.९३-९४.

**अर्घ्य -** ओंजळीत पाणी घेऊन सूर्याभिमुख उभे राहून त्याचे ध्यान करीत अंगठा आणि तर्जनी वगळलेल्या ओंजळीने पाणी गाईच्या शिंगाइतकी दूर धरून ओंजळीतील पाणी वर उचलून गायत्रीमंत्राने तीन वेळा अर्घ्य द्यावे.९५.

अर्घ्यदानानंतर *'असावादित्यो ब्रह्म'* या मंत्राने सूर्याचे ध्यान करीत, जो या पुरुषात आहे तोच त्या आदित्यांत आहे या श्रुतीच्या (तैत्तिरीय उपनिषद २:८) साराचे चिंतन करीत, आपल्याभोवती पाणी शिंपडत उजवी प्रदक्षिणा करावी आणि आचमन करावे. माध्याह्न संध्येत *'हंसः शुचिषत्'* या मंत्राने वाकून अर्घ्य द्यावे.९६. घराबाहेर जप केल्यास दुप्पट फळ, नदीवर केल्यास तिप्पट, गोठ्यात शतगुण, वनांत, अग्निहोत्रस्थानी किंवा हरिहरांच्या मूर्तीसमोर अपरिमित फळ लाभते.९७.

**काष्ठासनेऽकीर्त्यकर्णं दौरात्म्यं पल्लवेंऽशुके । दैन्यं रुग्ग्राव्ण्यथाऽऽरोग्यं भसिते कम्बले सुखम् ।।९८।।**
**विदैणेयेजिने द्वैपे मोक्षः प्रज्ञायुषी कुशे । व्याहृत्यास्मिन्सिद्धपद्म-स्वस्तिकाद्यासनात्सुखं ।।९९।।**
**उपविश्य क्षमां प्रार्थ्य भूतान्युत्सार्य भावयेत् । यथाङ्गमात्मन्यात्मानं देव्या तद्रूपमेकधीः ।।१००।।**

काष्ठ+आसने अकीर्ति+अक+ऋणं, पल्लवे दौरात्म्यं, अंशुके दैन्यं, ग्राव्णि रुक्, भसिते आरोग्यं, कम्बले सुखं,।९८। ऐणेये अजिने विद्, द्वैपे मोक्षः, कुश+आसने प्रज्ञा+आयुषी। अस्मिन् सिद्ध+पद्म+स्वस्तिक+आदि आसनात् सुखं व्याहृत्या उपविश्य,।९९। क्षमां प्रार्थ्य, भूतानि उत्सार्य, एक+धीः यथा अङ्गं देव्या आत्मनि आत्मानं तत्+रूपं भावयेत्।१००।

**आसनविचार -** लाकडाच्या आसनावर बसल्यास अपकीर्ती, दुःख आणि ऋण, पानाच्या आसनावर किंवा वस्त्रावर बसल्यास दुःस्वभाव, दगडावर बसल्यास दैन्य आणि रोग अशी फळे आहेत. अर्थात वरील आसनांवर बसू नये. भस्मावर बसल्यास आरोग्य, लोकरीच्या आसनावर सुख, मृगाजिनावर ज्ञान, व्याघ्राजिनावर मोक्ष आणि कुशासनावर बुद्धी आणि आयष्याची वृद्धी अशी फळे आहेत. अर्थात या आसनांवर बसावे. हे झाले ज्याच्यावर बसायचे (*आस्यते अस्मिन इति आसनम्*) त्या आसनाविषयी. आता ज्या पद्धतीने बसायचे (*आस्यते अनेन इति आसनम्*) त्याविषयी सांगतात. सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादींपैकी एका आसनावर सात व्याहृतींचा उच्चार करून विधिपूर्वक सुखाने बसावे. या आसनांचे वर्णन हठयोगप्रदीपिकेत (१:२१,२५,३७) पाहावे.९८-९९.

*'पृथ्वि त्वया'* या मंत्राने भूमीची प्रार्थना करून, *'अपसर्पन्तु ते भूता'* आणि *'अपक्रामन्तु भूतानि'* या मंत्रांनी भूतांना दूर सारून, एकचित्ताने गायत्री आपल्या हृदयादि अंगांत कल्पून आपण तद्रूप आहोत अशी भावना करावी.१००.

**आर्षदैवतछन्दांसि स्मरन्नक्षरपूर्वकान् । न्यासान्कृत्वाऽखिला मुद्राः प्रदर्श्य मनुदेवताम् ॥१०१॥**
**तां बालां बालादित्येति त्रिभिर्ध्यानैस्त्रिकालतः । ध्यात्वा चागच्छ वरद इति तिष्ठन्समाहितः ॥१०२॥**
**प्रागास्यो मन्त्रार्थमनु-सन्दधानो जपेच्छनैः । सोङ्कारव्याहृतिं देवीं छिन्नपादां स्रजांशुके ॥१०३॥**

आर्ष+दैवत+छंदांसि स्मरन् अक्षर+पूर्वकान् न्यासान् कृत्वा, अखिला मुद्रा प्रदर्श्य मंत्रदेवतां (स्मरन्)।१०१। 'तां बालां बालादित्य' इति त्रिभिः ध्यानैः त्रिकालतः च 'आगच्छ वरदे' इति ध्यात्वा समाहितः प्राक्+आस्यः तिष्ठन् मंत्र+अर्थ+अनुसंधानः स+ओंकार+व्याहृतिं छिन्न+पादां देवीं अंशुके स्रजा शनैः जपेत्।१०२-१०३।

गायत्रीमंत्राचे विश्वामित्र ऋषी, सविता देवता आणि गायत्री छंद यांचे स्मरण करून गायत्रीच्या चोवीस अक्षरांनी न्यास करून मंत्रदेवतेला सर्व मुद्रा दाखवाव्यात. देवी या पदाने इथे गायत्री जाणावी. आत्मस्वरूपाचे यथार्थ प्रकाशन तीच करते. तीच ब्रह्मज्ञानाचे उपादान - प्रमुख साधन आहे. कारण तीच सर्व छंदांत प्रधान आहे; ती सोमाचे आहरण करते; इतर छंदांची अक्षरे तिच्यात सामावलेली असल्याने ती सर्व छंदांना व्यापून आहे; ती सर्व सवनांना व्यापून आहे. या कारणांनी मंत्रजपात गायत्रीलाच प्राधान्य आहे. विशेषतः ब्राह्मणांचे सत्त्व गायत्रीच आहे. म्हणूनच सर्वश्रेष्ठ गायत्रीमंत्र सोडून इतर कोणताही श्रेष्ठतर मंत्र नाही. त्यासाठी संन्याशांशिवाय इतर सर्व द्विजातींनी तीनही काळात (प्रातः, मध्याह्न, सायं) गायत्रीचाच जप करावा.१०१.

पुढे त्या गायत्रीचे सकाळी '*तां बालां बालादित्यमंडलस्थां*' हे ब्राह्मी, मध्याह्नाला वैष्णवी आणि सायंकाळी शैवी या तीन ध्यानांपैकी कालानुरूप, *'आगच्छ वरदे देवी'* म्हणत गायत्रीचे ध्यान करावे.१०२. मग चित्त समाहित (एकाग्र) करून पूर्वाभिमुख उभे राहावे. गायत्रीमंत्राच्या अर्थाकडे लक्ष देत, ओंकार आणि व्याहृतींसह गायत्रीचा तीन पाद तोडून सावकाश जप करावा. माळ वस्त्रांत धरलेली असावी.१०३.

**मन्त्रकारौ मनस्त्राणौ तद्योगान्मन्त्र उच्यते । जन्मविच्छेदपापघ्नौ जपकारौ तु तद्युजा ।।१०४।।**

म+त्र+कारौ मनः+त्राणौ तत् योगात् मन्त्र उच्यते। जन्म+विच्छेद+पापघ्नौ ज+प+कारौ तु तत् युजा।१०४।

**गायत्री मंत्राचा संक्षिप्त अर्थ.**

**तत्** म्हणजे गीतेच्या वचनानुसार (१७:२३) परब्रह्म;

**सवितुः** सविता म्हणजे प्रसविता - जनिता. हे सृष्टी, प्रलय आणि स्थिती यांचे उपलक्षण. या संपूर्ण चराचर जगदाभासाचे अधिष्ठानभूत परब्रह्म;

**वरेण्यं** सूक्ष्म बुद्धीनेच आकळण्याजोगे निरतिशय आत्मस्वरूप;

**भर्गो** सर्व अनर्थांचे मूळ असणाऱ्या अविद्या, काम, कर्म आदि दोषांचे भर्जन करणारे, त्यांना जाळून टाकणारे (स्वरूप);

**देवस्य** द्योतनात्मक - स्वयंप्रकाश आणि सर्वप्रकाशक; गीतेच्या (१५:६) भाषेत जिथे न सूर्य प्रकाशतो, न चंद्र न अग्नी, जिथे पावल्यावर पुन्हा संसारात परतत नाही ते माझे परम धाम आहे. (*न तद्भासयते सूर्यो न शंशाङ्को न पावकः। यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।।*). याच अर्थाचा मंत्र कठ उपनिषदांतही (२:५:१५) आहे.

**धीमही** (आम्ही) चिंतन करतो.

**यः** जो जीवात्म्याहून अभिन्न असा परमात्मा.

**नः** आमच्या

**धियः** बुद्धीच्या वृत्तीना

**प्रचोदयात्** प्रेरणा करो.

**प्रोक्तो जपो हि यज्ञोऽयं सर्वयज्ञेषु तूत्तमः। वाचिकोऽसन्मानसः सन् रहस्यो मध्यमो जपः ॥१०५॥**

सर्व+यज्ञेषु तु अयं जपः हि उत्तमः प्रोक्तः। वाचिकः जपः असन्, मानसः सन् रहस्यः मध्यमः।१०५।

सारांश, सर्वसाक्षी, अखिल द्वैतभ्रमाचे अधिष्ठान, परमानंदस्वरूप, सर्व अनर्थांचा निरास करणारे, स्वप्रकाश, चिद्रूप अशा ब्रह्माचे चिंतन करावे. असे चिंतन केल्याने ब्रह्मावर, दोरीवर जसा सापाचा, तशा झालेल्या आभासाचा किंवा विवर्तरूप अध्यारोपाचा अपवाद - निरास, होऊन जीवात्मा आणि परमात्मा यांचे सामान्याधिकरण (एकरूपतेचा निश्चय) होते. या मंत्राच्या अर्थाचे अनुसंधान जपाच्या वेळी करावे. एकदा सांगून ज्ञान झाले नाही तर त्याची वरचेवर आवृत्ती करावी (*आवृत्तिरसकृदुपदेशात्।*) या न्यायानुसार (ब्र.सूत्र ४:१:१) साक्षात्कार होईपर्यंत वरचेवर जप करीत राहावे.

**म**कार म्हणजे मन आणि **त्र**कार म्हणजे त्राण किंवा राखण. यांच्या संयोगाने **मन्त्र** हा शब्द झाला. मनाचे रक्षण करतो तो मंत्र. **ज** म्हणजे जन्मविच्छेद आणि **प** म्हणजे पापनाश यांच्या संयोगाने **जप** शब्द होतो. जन्ममरणांचा छेद करून पापाचा नाश करतो तो जप असा याचा अर्थ.१०४. सर्व यज्ञांत भगवंतांनी हा जपयज्ञच उत्तम मानला आहे (*यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।* भ.गीता १०:२५). हा यज्ञसुद्धा न केला तर तुलनेने कमी सुखाचा हा मानवलोकही मिळणे अशक्य आहे. मग इतर लोकांचा तर विचारच नको. (*नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम।* भ.गीता ४:३१) मोठ्याने उच्चार करून म्हटलेला जप निकृष्ट होय. जीभ किंवा ओठही न हलता केलेला मानसिक जप उत्तम होय. उच्चार न करता पण जीभेची/ओठांची हालचाल करून केलेला रहस्य (*उपांशु*) जप मध्यम जाणावा.१०५.

**शाखारेखाशङ्खमणि-प्रवालस्फटिकैर्जपे । मुक्तापद्माक्षीस्वर्णाक्षैर् दशोत्तरगुणं फलम् ।।१०६।।**
**प्रोक्षिता स्रक् सती मेरु-लङ्घने स्रक्च्युतौ जपे । तन्द्र्यादौ च जपाच्छुद्धिर् देवीं नासाग्रदृग्जपेत् ।।१०७।।**
**यतिर्जपेत्षडोङ्कारां सहस्रं चाष्टयुक्शतम् । अन्योऽष्टाविंशतिं पङ्क्तिं नार्थार्थं तां जपेद् द्विजः ।।१०८।।**
**मैत्रैः सौरैरुपस्थाय वारुणैश्च क्रमात्सदा । जातवेदसे तच्छंयोस् त्रिर्नमो ब्रह्मणे इति ।।१०९।।**

जपे शाखा+रेखा+शंख+मणि+प्रवाल+स्फटिकैः मुक्ता+पद्माक्षी+ स्वर्ण+अक्षैः दश+उत्तर+गुणं फलम्।१०६। स्रक् प्रोक्षिता सती। जपे मेरु+लङ्घने, स्रक् च्युतौ, तन्द्री+आदौ च जपात् शुद्धिः। देवीं नास+अग्र+दृक् जपेत्।१०७। यतिः षट्+ओंकारां सहस्रं जपेत्। अन्यः अष्ट+युक् शतं, अष्टाविंशतिं, पङ्क्तिं (जपेत्)। द्विजः तां अर्थ+अर्थं न जपेत्।१०८। मैत्रैः सौरैः वारुणैः च क्रमात् उपस्थाय, सदा जातवेदसे, तच्छंयोः त्रिः नमो ब्रह्मणे इति।१०९।

बोटांनी, बोटांच्या पेरांनी किंवा शंख, मणी, प्रवाळ, स्फटिक, मोती, पद्माक्षी, सोन्याचे मणी आणि रुद्राक्ष यांच्या माळांनी जप करावा. हे सर्व एकाहून एक दसपट अधिक फळ देतात. म्हणजे बोटांच्या जपाच्या दसपट पेरांनी जप केल्याचे फळ, त्याच्या दसपट शंखांच्या माळेने केलेल्या जपाचे फळ इत्यादि. माळा १०८ मण्यांच्या असाव्या. स्त्रियांना - विशेषतः सुवासिनींना रुद्राक्ष व तुळशीच्या माळा निषिद्ध आहेत.१०६. माळ प्रोक्षण करून घेतलेली चांगली. जप करताना माळ पडली, मेरुमणी ओलांडला किंवा झोप आली तर दोष सांगितला आहे. त्याची अधिक जपाने (किमान एक माळ) शुद्धी होते. गायत्रीचा जप करताना दृष्टी नासिकेच्या अग्रावर (मुळावर? आज्ञाचक्रावर) ठेवावी.१०७. यति शब्दाने इथे बहूदक आणि कुटीचक संन्यासी अभिप्रेत आहेत. त्यांनी सहा ओंकारयुक्त गायत्री मंत्राचा एक हजार जप करावा. ब्रह्मचारी, गृहस्थ आणि वानप्रस्थ यांनी एकशे आठ जप करावा. अशक्त असेल तर किंवा अडचणीच्या वेळी अठ्ठावीस अथवा दहा जप केला तर चालेल. द्विजांनी पैशासाठी गायत्री जप करू नये.१०८. जपानंतर प्रातःकाली मित्रदेवतात्मक *'मित्रस्य चर्षणी धृतो,'* माध्याह्नी सूर्यदेवतात्मक *'उदुत्यं जातवेदसे'* आणि सायंकाळी वरुणदेवातात्मक *'तत्त्वायामि'* या मंत्रांनी उपस्थान करावे. तिन्ही काळी *'जातवेदसे', 'तच्छयोः'* यांनी उपस्थान करून आणि *'नमो ब्रह्मणे'* या मंत्रांचे तीन वेळा पठण करावे.१०९.

**प्रणम्य दिक्तत्पदेव-विप्रान्सन्ध्यां विसृज्य च । गुरुं निषण्णं प्रागास्यं संमुखोऽत्राभिवादयेत् ।।११०।।**
**कराभ्यां यथावामान्य-कर्णौ स्पृष्ट्वा पदौ गुरोः । व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरोऽङ्घ्र्योर्न्यसेत्तदभिवादनम् ।।१११।।**
**हृद्दृग्वाक्पत्कोरुवक्षः-करैर्देवान्नमेद्वरान् । ज्ञानल्पानपि सद्विप्रान् पाणिभ्यान्नाशुचीन्नमेत् ।।११२।।**
**कर्मस्थाग्न्यादिहस्तान्तद्वत्स्वयं चाल्पकान्करात् । उद्वाहोर्ध्वं चरेत्सायं प्रातरौपासनं स्वयम् ।।११३।।**

दिक्+तत्+प+देव+विप्रान् प्रणम्य, सन्ध्यां विसृज्य च प्राक्+आस्यं गुरुं संमुखः अत्र अभिवादयेत्।११०। कराभ्यां यथा+वाम+अन्य+कर्णौ स्पृष्ट्वा, गुरोः पदौ व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरः अङ्घ्र्योः न्यसेत् तत् अभिवादनम्।१११। हृत्+दृक्+वाक्+पत्+क+उरु+वक्षः+करैः देवान् नमेत्। वरान्, अल्पान् अपि ज्ञान्, सत्+विप्रान् पाणिभ्यां नमेत्।११२। अशुचीन्, कर्मस्थान्, अग्निहस्तान्, तद्वत् स्वयं न (नमेत्)। अल्पकान् करात् (नमेत्)। उद्वाह+ऊर्ध्वं स्वयं सायं प्रातः औपासनं चरेत्।११३।

प्राच्यादि दिशा, त्यांचे इंद्रादि दिक्पाल आणि सर्व ब्राह्मणांना प्रणाम करून '*उत्तमे शिखरे*' मंत्राने संध्येच्या विसर्जनानंतर पूर्वाभिमुख बसलेल्या गुरूंना सामोरे जाऊन किंवा इतर वेळीही अभिवादन करावे.११०.

अभिवादन कसे करावे ते सांगतात. आपल्या डाव्या हाताने डाव्या कानाला आणि उजव्या हाताने उजव्या कानाला स्पर्श करून, उजवा हात डाव्या हातावरून गुरूंच्या उजव्या पायाला लावावा व डावा हात डाव्या पायाला लावावा आणि मग आपले मस्तक त्यांच्या पायांवर ठेवावे.१११. देवांना मन, दृष्टी, वाणी, पाय, शिर, मांड्या आणि हात ही आठ अंगे जमिनीला टेकून साष्टांग नमस्कार करावा. आपल्यापेक्षा मोठे, वयानेही लहान असलेले ज्ञानी, सात्त्विक ब्राह्मण यांना दोन्ही हात जोडून नमस्कार करावा.११२. सूतकी इत्यादि अशुद्धांना, कर्म करीत असणारा, अग्नी किंवा समिधा हातात असलेल्यांना, तसेच स्वतः अशुची, कर्मांत किंवा अग्निधारी असल्यास, नमस्कार करू नये. शूद्रादि हीनांना एका हाताने नमस्कार करावा.११३.

**पत्नी वान्यतराग्रेऽन्यश् चेद्धमन्या प्रबोध्य तम् । प्रादुष्कृताग्निं ध्यात्वालङ्कृत्य संस्कृत्य हौम्यकम् ।।११४।।**
**ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः सूर्याय चाग्नये । सायं तूष्णीं तूभयत्र द्वितीयां जुहुयात्ततः ।।११५।।**
**उपतिष्ठेत्स्वर्चिताग्निः सूर्याग्निमनुभिः क्रमात् । कायाभ्यां तूभयत्रात्र षष्टिधान्यमिताहुतिः ।।११६।।**

पत्नी वा अन्यः चेत् अन्यतर+अग्रे। तं धमन्या प्रबोध्य प्रादुष्कृत+अग्निं ध्यात्वा अलङ्कृत्य, हौम्यकं संस्कृत्य।११४। ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः 'सूर्याय', सायं 'अग्नये', तूष्णीं ('प्रजापतये' इति) द्वितीयां जुहुयात्।११५। सु+अर्चित+अग्निः उपतिष्ठेत् क्रमात् सूर्य+अग्नि+मन्त्रैः उभयत्र कायाभ्यां उपतिष्ठेत्। अत्र षष्टि+धान्य+मिता आहुतिः।११६।

**अग्नीची उपासना -** विवाहानंतर रोज सकाळी व सायंकाळी अग्नीची उपासना करावी. किंवा पत्नीने करावी. आश्वलायन गृह्य सूत्रांत (१:९:१-२) दिल्याप्रमाणे पुत्र, कुमारी, अन्तेवासी किंवा नित्य अनुग्रहीत यांनी केल्यास ते स्वतः किंवा पत्नीच्या समोर करावे. वेळूच्या फुंकणीने अग्नी प्रज्वलित करावा. मुखाने करू नये. प्रज्वलन सूर्योदयाच्या पूर्वी किंवा सूर्यास्ताच्या पूर्वी करावे. यात विलंब झाला तर व्याहृतिहोम करून श्रुत्युक्त प्रायश्चित्त घ्यावे. प्रज्वलित अग्नीचे ध्यान करावे. परिसमूहन आणि परिस्तरण करून अग्नीला अलंकारावे. मग होमद्रव्यावर संस्कार करावा.११४. प्रातःकाळी (सूर्योदयापासून संगवापर्यंत) '*सूर्याय इदं न मम*' या मंत्राने व रात्री (सूर्यास्तापासून दहा घटकापर्यंत) '*अग्नय इदं न मम*' या मंत्राने अग्नीच्या ज्वालांत समिधांची आहुती घालावी. दोन्ही वेळा मंत्र मनातच म्हणावा. नंतर '*प्रजापतय इदं न मम*' या मंत्राने दुसरी आहुती द्यावी.११५.

परिस्तरणाचे विसर्जन करून परिसमूहादिकांनी अग्नीची पूजा करून मग सकाळी सूर्य आणि सायंकाळी अग्नीच्या मंत्रांनी व दोन्ही वेळा प्रजापतीच्या मंत्रांनी, '*हिरण्यगर्भःप्रजापत*' (शुक्ल यजुर्वेद २३:१:१, २३:६५:१) उपस्थान करावे. या स्थानी साठ साळींची आहुती द्यावी. शंभर तांदूळांचा प्रस्थ किंवा चौसष्ट अंशांची आहुती द्यावी. उशीर झाल्यास चौपट तुपाने व्याहृतिहोम करावा. संकटकाळी सम होमाचा किंवा तीन पक्षांनी पक्षहोमाचे पर्याय अवलंबावेत.११६.

**पयोदध्याज्यनीवार-यवव्रीह्यादि हौम्यकम् । गृह्यं परिचरेच्छ्रौताग्नीन्वापि ज्ञाततद्वृषः ।।११७।।**
**नातीयाद्ब्राह्मणो यज्ञान् नित्यमासिकवार्षिकान् । नाहोतीयाद्विना दानं शक्त्या दद्यात् किमप्युत ।।११८।।**
**भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्सर्वदाऽसकृत् । संस्कृते साररे च्छन्ने स्वे गृहे निवसेद्गृहि।।११९।।**
**भूः पूताप्युपलिप्ता चेत् पुनर्लेपेन शुद्ध्यति। तन्नित्यं वास्तूपलिम्पेत् प्रेताद्योऽलिप्तकेऽस्ति हि ।।१२०।।**

पयः+दधि+आज्य+नीवार+यव+व्रीहि आदि हौम्यकम्। गृह्यं परिचरेत्। श्रौत+अग्नीन् वा अपि ज्ञात+तत्+वृषः।११७। ब्राह्मणः नित्य+मासिक+वार्षिकान् यज्ञान् न अतीयात्। विना दानं न आहोतीयात्। शक्त्या किं अपि उत दद्यात्।११८। सर्वदा असकृत् भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्। गृही संस्कृते स+अररे छन्ने गृहे निवसेत्।११९। भूः पूता अपि उपलिप्ता चेत् पुनः+लेपेन शुद्ध्यति। तत् वास्तुं नित्यं उपलिम्पेत्। अलिप्तके प्रेताद्याः अस्ति हि।१२०।

दूध, दही, तूप, देवसाळ, जवसाळ, तादूळ ही हवनीय द्रव्ये आहेत. अशा प्रकारे गृह्य अग्नीची किंवा त्याचे विधिविधान जाणून श्रौत अग्नीची परिचर्या करावी. ईशावास्यातील (११,१२) '*विद्यां चाविद्यां*' या प्रतिपादनानुसार कर्माविषयी ज्ञानाच्या अभावांत अनिष्टाची संभावना असते.११७. ब्राह्मणानी नित्याचे पाच महायज्ञ, तसेच दर्श, आग्रयण इत्यादि मासिक व वार्षिक यज्ञ चुकवू नयेत. तसेच दानाशिवाय होम करू नये. शक्त्यनुसार कांही थोडे तरी द्यावेच.११८.

वर सांगितलेल्या '*यस्य स्मृत्या*'... '*प्रमादं कुर्वतां*' या स्मृतिवचनांप्रमाणे कर्मातील न्यूनता दूर करण्यासाठी वारंवार भगवान विष्णूंचे स्मरण करावे. गृहस्थाने वास्तुशांत्यादींनी संस्कारलेल्या, भिंतीनी व छताने आच्छादलेल्या, कपाटांनी युक्त अशा आपल्या स्वतःच्या घरात राहावे. कपाटांनी रहित, नीट न झाकलेले आणि ज्या घरांत बली आणि भोजन दिले जात नाही त्यांत प्रवेशही करू नये. ते संकटांचे आगर असते. '*अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं। गृहं न प्रविशेद्धीमानापदामाकरो हि सः।।*' (निर्णयसिंधू.)११९. महागरुडपुराणांत (प्रेतखंड, धर्मकांड २:१०) सांगितल्याप्रमाणे भूमी सर्वत्र पवित्रच असली तरी एकदां सारविलेली जमीन पुन्हा सारवल्याने शुद्ध होते. (*सर्वत्र वसुधा पूता यत्र लेपो न विद्यते। यत्र लेपो भवेत्तत्र पुनर्लेपेन शुद्ध्यति।।*'). यासाठी जमीन रोज सारवावी. न सारवलेल्या जमिनीवर भूतप्रेतादिकांचा वावर असतोच.१२०.

**कांस्यांशुकेऽत्र गर्ह्ये गो-विशा नैर्ऋतितो गृहम् । उपलिप्य स्वलङ्कार्यं रङ्गवल्ल्यादिनान्वहम् ।।१२१।।**
**स्थाप्यं गव्यं तिलाश्चर्म मणिश्रीखण्डधेनवः । त्रिसन्ध्येऽर्च्योऽमरः प्रातर्विस्तराच्चन्दनादिना ।।१२२।।**
**मध्याह्ने निशिदीपैर्वा गोवज्जन्मान्यथा द्विज । गुर्वर्काग्न्यम्ब्वष्टधार्चा गोविप्रान्यतमार्चनम् ।।१२३।।**
**कुर्यात्तिष्येऽजसामीप्यं शालिग्रामे तमप्युत । गुर्वाज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्स प्रसीदति ।।१२४।।**
**देवो भक्ततपोयोगादृच्छत्यर्चनगौरवात् । बिम्बाभिरूप्यात्सामीप्यं भक्तिरेवात्र कारणम् ।।१२५।।**

अत्र कांस्य+अंशुके गर्ह्ये। गो+विशा नैर्ऋतितो गृहं उपलिप्य रंग+वल्ल्यादिना अन्वहं सु+अलङ्कार्यम्।१२१। गव्यं तिलाः चर्म मणि+श्रीखंड+धेनवः स्थाप्यम्। त्रिसन्ध्ये अमरः अर्च्यः। प्रातः विस्तरात्।१२२। मध्याह्ने चन्दनादिना, निशि दीपैः वा। (हे) द्विज, अन्यथा जन्म गोवत्। गुरु+अर्क+अग्नि+अम्बु+अष्टधा +अर्चा गो+विप्र+अन्यतम अर्चनम्।१२३। तिष्ये शालिग्रामे अज+सामीप्यम्। तं अपि उत गुरु+आज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्। सः प्रसीदति।१२४। देवः भक्त+तपो+योगात्, अर्चन+गौरवात्, बिम्ब+आभिरूप्यात् सामीप्यं ऋच्छति। अत्र भक्तिः एव कारणम्।१२५।

सारवतांना कांशाचे भांडे किंवा वस्त्र ही निषिद्ध आहेत. गाईच्या शेणाने नैर्ऋत्य कोपऱ्यापासून सुरुवात करून घर सारवावे. नंतर ते रोज रांगोळ्यांनी वगैरे चांगले सजवावे.१२१. **देवपूजा -** घरात दूध-दुभते, तीळ, मृगाजिन, शाळिग्राम, चंदनाचे खोड आणि दुभती गाय ठेवावेत. त्रिकाळ देवपूजा करावी. सकाळी सविस्तर पूजा करावी.१२२. माध्याह्नी चंदनादींनी पंचोपचार पूजा व रात्री आरती करावी. अन्यथा हा जन्म पशुवत् जाणावा. गुरू, सूर्य, गृह्याग्नी, तीर्थादि जल, शास्त्राभिमत देवतांच्या आठ प्रकारच्या मूर्ती (काष्ठ, पाषाण, सुवर्णादि धातु, वालुका, मृत्तिका, चित्र, रत्नमणी, मनोमयी), गाय, वेदज्ञ ब्राह्मण यांपैकी एकाची पूजा करावी.१२३. कलियुगात शाळिग्रामात विष्णूचा वास असतो, त्याचीही पूजा करावी. गुरूंची आज्ञा घेऊन भक्तिभावाने पूजा केल्याने देव प्रसन्न होतो.१२४. भक्ताच्या तपोरूपी योगाने, अर्चनाच्या विपुलतेने आणि प्रतिमेच्या सौंदर्याने देव सामीप्य प्रदान करतो. यांत सर्वातही भक्ती हेच कारण आहे.१२५.

**नाश्रद्धधानोऽधिकारी संशयात्मात्र नास्तिकः । येभ्यो मातेति पुंगन्धं निवार्यादाय चाखिलान् ।।१२६।।**
**संभारानुपविश्याग्रे देवस्याप्पूरितं घटम् । दक्षभागे निधायाब्जं प्रपूज्य प्रोक्ष्य तत्स्थलम् ।।१२७।।**
**स्वं संभारांश्च भूभूत-शुद्धिं कृत्वा यथायथम् । प्राणान्प्रतिष्ठाप्य चान्तर् बहिर्मातृकया न्यसेत् ।।१२८।।**
**तनौ देवेऽपि पूंसूक्त-मन्त्रैश्चापि यथाक्रमम् । कराङ्घ्र्यूरुकटीनाभि-हृद्ग्रीवादोर्मुखाक्षिके ।।१२९।।**

अत्र अश्रद्धधानो संशयात्मा, नास्तिकः अधिकारी न। 'येभ्यो माता' इति पुं+गन्धं निवार्य अखिलान् संभारान् आदाय।१२६। उपविश्य, देवस्य अग्रे दक्षभागे घटं निधाय, अब्जं प्रपूज्य, तत् स्थलं प्रोक्ष्य, प्राणान् प्रतिष्ठाप्य च अन्तः बहिः मातृकया न्यसेत्।१२७-१२८। तनौ देवे अपि पुंसूक्त+मन्त्रैः च अपि यथाक्रमं कर+अङ्घ्रि+ऊरु+कटी+नाभि+हृत्+ग्रीवा+ दोः+मुख+अक्षिके (न्यसेत्)।१२९।

श्रद्धाहीन, संशयग्रस्त आणि नास्तिक यांना देवपूजेचा अधिकार नाही. '*शोकाक्रान्तः कृपाविष्टः श्रद्धया रहितः पुमान्। गुरुदेवद्विजातीनां पूजनं न समाचरेत्।।*' असे शास्त्रवचन आहे. माणसाच्या वासापासून देव दूर जातात त्या दुर्गंधाच्या निवारणासाठी '*येभ्यो माता*' आणि '*एवा पित्रो*' या मंत्रांचा उच्चार करावा. अर्भवाख्यानांत (ऐतरेय ब्राह्मण ३:३:६) मनुष्यगंधाला उबगून देवता अंतर्धान पावल्याचे सांगितले आहे. १२६. पूजेची सर्व सामग्री जमवून देवासमोर बसावे. देवाच्या उजव्या बाजूला पाण्याने भरलेला कलश ठेवावा. मग शंखाची पूजा करून त्यातील पाणी, पूजेची जागा, आपण स्वतः आणि पूजाद्रव्यांवर प्रोक्षण करावे. नंतर भूमी आणि भूत यांची शुद्धी करून अंतर्मातृका आणि बहिर्मातृका यांनी न्यास करावेत.१२७-१२८. तसेच स्वतःच्या शरीरावर आणि देवाच्या मूर्तीवर पुरुषसूक्तमंत्रांनी अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या मंत्रांनी हात, तिसऱ्या व चौथ्या मंत्रांनी पाय, पाचव्या व सहाव्या मंत्रांनी मांड्या, सातव्या व आठव्या मंत्रांनी कटीचे दोन्ही भाग, नवव्या मंत्राने नाभी, दहाव्या मंत्राने हृदय, अकराव्याने कंठ, बाराव्या व तेराव्या मंत्रांनी बाहू, चौदाव्या मंत्राने मुख, पंधराव्याने डोळे आणि सोळाव्या मंत्राने शीर असे न्यास करावेत. मागे सांगितल्याप्रमाणे अंगांचे न्यास करताना डावीकडून क्रम ठेवावा.१२९.

**एवं भूत्वा सुरोऽर्घ्यादि-पात्राण्यप्पूरितानि च । संस्थाप्येशकलां हृत्स्थाम् आपादतलमस्तकम् ।।१३०।।**
**ध्यात्वाञ्जलौ सुमगतां विभाव्यार्चागतां ततः । प्रकल्प्यार्चां देवरूपां साक्षान्मत्वा ततोऽर्चयेत् ।।१३१।।**
**सम्पूज्य पीठद्वाराशा मन्त्रतन्त्रविधानतः । पुंमन्त्रैर्वाह्वानपीठ-पाद्यार्घ्याचमनाप्लवान् ।।१३२।।**
**वस्त्रे सूत्रे गन्धपुष्पे धूपदीपाशनादिकम् । नतिप्रदक्षिणापुष्पाञ्जलीन्भक्त्याऽर्पयेत्क्रमात् ।।१३३।।**

एवं सुरः भूत्वा अप्+पूरितानि अर्घ्यादि पात्राणि च संस्थाप्य हृत्+स्थां आपाद+तल+मस्तकं ध्यात्वा अञ्जलौ सुमगतं विभाव्य ततः अर्चा+गतं प्रकल्प्य अर्चां साक्षात् देवरूपं मत्वा ततः अर्चयेत्।१३०-१३१। मन्त्र+तन्त्र+विधानतः पीठ+द्वार आशा सम्पूज्य पुं+मन्त्रैः आह्वान+पीठ+पाद्य+अर्घ्य+आचमन+आप्लवान्।१३२। वस्त्रे, सूत्रे, गन्ध+पुष्पे धूप+दीप+अशन+आदिकं नति+प्रदक्षिणा+पुष्पाञ्जलीन् भक्त्या क्रमात् अर्पयेत्।१३३।

आह्निककारिकेच्या '*देवो भूत्वा यजेद्देवम्*' या वचनानुसार या न्यासांनी देवरूप होऊन पाण्याने भरलेली पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान यांची भांडी आपापल्या जागी ठेवावी. हृदयस्थ ईश्वरकला (जीवात्मा) हीच गुरूपदिष्ट मूर्ती असे जाणून ती आपादमस्तक ध्यानात आणावी. तीच श्वासमार्गाने ओंजळीतील घेतलेल्या पुष्पांत गेली अशी भावना करावी. नंतर तीच फुले देवाला वाहून त्या फुलांतून ती देवाच्या मूर्तीत संक्रमित झाली अशी भावना करावी. मग ती मूर्ती साक्षात् देवतारूप असे मानून पूजा करावी.१३०-१३१. मंत्र आणि तंत्रविधानानुसार पीठद्वार आणि दिशा यांच्यासहित प्रतिमेचे पूजन करावे. किंवा पुरुषसूक्ताच्या मंत्रांनी क्रमशः आवाहन (*सहस्र..*), आसन (*पुरुष..*), अर्घ्य (*त्रिपादू..*), आचमन (*तस्माद्वि..*), स्नान (*यत्पुरुष..*), वस्त्रे (*तं यज्ञं..*), यज्ञोपवीत (*तस्माद्य..*), गंध (*तस्माद्य..*), पुष्पे (*तस्मादश्वा..*), धूप (*यत्पुरु..*), दीप (*ब्राह्मणो..*), नैवेद्य (*चंद्रमा..*), नमस्कार (*नाभ्या आ..*), प्रदक्षिणा (*सप्तास्या..*) आणि पुष्पांजली (*यज्ञेन..*) हे सोळा उपचार भक्तिपूर्वक समर्पण करावेत.१३२-१३३.

**(क्षेपकः) यजेत्पौराणिकैर्मन्त्रैः स्त्रीः शूद्रश्च द्विजोदितैः ।**
**संभवे सत्याप्लवादौ दद्यात्पञ्चामृतानि च । भूषाः सुभोगा गन्धोर्ध्वमशनेऽन्नं चतुर्विधम् ।।१३४।।**
**राजोपचारताम्बूल-दक्षिणारार्तिकैः फलैः । स्तोत्रैर्गीतैर्नृत्यवाद्यैस्तोषयेद् द्विजभोजनैः ।।१३५।।**
**घण्टानादं चरेदादौ स्नाने धूपप्रदीपयोः । दद्यादाचमनं स्नाने नैवेद्ये वस्त्रसूत्रयोः ।।१३६।।**
**जलं प्रत्युपचारं च शङ्खांब्वीशं विनाप्लुतौ । स्वारामारण्यक्रयाप्तं पुष्पं सन्मध्यमं त्वसत् ।।१३७।।**
**तद्वच्छ्वेतारक्तकृष्णं वर्ज्यं पर्युषितं सुमम् । सच्छिद्रं जन्तुयुक् शीर्णं कीटाद्यात्तं स्वयं च्युतम् ।।१३८।।**

स्त्रीः शूद्रः च द्विज+उदितैः पौराणिकैः मन्त्रैः यजेत्।क्षेपकः। संभवे सति, आप्लव आदौ पञ्चामृतानी, गन्ध+ऊर्ध्वं भूषा, सुभोगाः, अशने चतुर्विध अन्नं च दद्यात्।१३४। राज+उपचार+ताम्बूल+दक्षिणा+आरार्तिकैः फलैः स्तोत्रैः गीतैः नृत्य+वाद्यैः द्विज+भोजनैः तोषयेत्।१३५। स्नाने, धूप+प्रदीपयोः आदौ घण्टानादं चरेत्। स्नाने, नैवेद्ये, वस्त्र+सूत्रयोः आचमनं दद्यात्।१३६। प्रति+उपचारं जलं, ईशं विना आप्लुतौ शङ्ख +अम्बु (दद्यात्)। स्व+आराम+अरण्य+क्रय+आप्तं पुष्पं सन्, मध्यमं तु असत्।१३७। तत्+वत् श्वेत+आरक्त+कृष्णं (पुष्पम्)। पर्युषितं सच्छिद्रं, जन्तुयुक्, शीर्णं, कीट+आदि+आत्तं स्वयं च्युतं सुमं वर्ज्यम्।१३८।

भक्तिमान् स्त्रिया आणि शूद्रांनी ब्राह्मण पुरोहिताने सांगितलेल्या पौराणिक मंत्रांनीच पूजा करावी; वैदिक मंत्रांनी करू नये (क्षेपक). शक्य झाल्यास अभिषेकापूर्वी पंचामृतस्नान, गंधानंतर अलंकार, चांगले भोग, नैवेद्यांत चतुर्विध अन्न हे उपचारही अर्पण करावे.१३४. पूजेच्या आरंभी, स्नानाच्या वेळी, धूप आणि दीप दाखविताना घंटानाद करावा. तसेच स्नान, नैवेद्य, वस्त्रे आणि यज्ञोपवीत अर्पणानंतर आचमन द्यावे.१३५. राजोपचार, तांबूल, दक्षिणा, आरती, फळे, स्तोत्रपठण, गायन, नृत्य, वाद्य तसेच ब्राह्मणभोजनाने देवाला तुष्टवावे.१३६. प्रत्येक उपचारानंतर पाणी द्यावे. शिव सोडून इतर देवांना अभिषेकानंतर शंखोदक द्यावे. फले स्वतःच्या बागेतील उत्तम, अरण्यातील मध्यम आणि विकतची कनिष्ठ जाणावीत.१३७. त्याचप्रमाणे श्वेत पुष्प उत्तम, लाल मध्यम आणि काळे वाईट जाणावे. शिळी, भोके पडलेली, जन्तुयुक्त, फाटकी, किडे वगैरेनी खाल्लेली, आपोआप पडलेली फुले देवाला वर्ज्य आहेत.१३८.

**समलं वामहस्ताङ्घ्रि-स्पृष्टं क्षालितमम्बुनि । बकुलाब्जाशोकजाती-दूर्वाबिल्वं शमी कुशः ॥१३९॥**
**तुलसी करवीरं च मल्लिकाशोकमुत्तमम् । कोविदारार्कधत्तूर-शाल्मलीकुटजैर्हरिः ॥१४०॥**
**नार्च्यो गणेशस्तुलस्या दूर्वयार्येश्वरोऽसितैः । रक्तैः केतकनिम्बाद्यैर् बिल्वं श्वेतसुमं प्रियम् ॥१४१॥**
**दूर्वा गणेशस्य विष्णोस् तुलसीत्यादि सर्वशः । ज्ञात्वा पुष्पाणि देयानि श्रद्धया देवतुष्टये ॥१४२॥**
**हुत्वा पुंसूक्तेन दत्वा पुष्पाणि प्रार्थयेद्धरिः । मन्त्रं जपेद्यथाशक्ति भक्त्या तद्गतहृद्द्विजः ॥१४३॥**

समलं, वाम+हस्त+अङ्घ्रि+स्पृष्टं, अम्बुनि क्षालितं (पुष्पं वर्ज्यम्)। बकुल, अब्ज, अशोक, जाती, दूर्वा, बिल्वं, शमी, कुशः, तुलसी, करवीरं च मल्लिका, अशोकं उत्तमम्। कोविदार, अर्क धत्तूर, शाल्मली, कुटजैः हरिः न अर्च्यः।१३९-१४०। गणेशः तुलस्या, आर्या दूर्वया, ईश्वरः असितैः रक्तैः केतक-निम्बाद्यैः न अर्चयेत्। बिल्वं श्वेतसुमं प्रियम्।१४१। गणेशस्य दूर्वा, विष्णोः तुलसी इत्यादि सर्वशः पुष्पाणि ज्ञात्वा श्रद्धया देवतुष्टये देयानि।१४२। पुंसूक्तेन हुत्वा, पुष्पाणि दत्वा हरिः प्रार्थयेत्। द्विजः भक्त्या तद्+गत+हृत् यथाशक्ति मन्त्रं जपेत्।१४३।

मळ चिकटलेले, डाव्या हाताचा किंवा पायाचा स्पर्श झालेले पाण्यात धुतलेले फूलही वर्ज्य आहे. बकुळी, कमळ, अशोक, चमेली, दूर्वा, बेलपत्र, शमीपत्र, कुश,(१३९) तुळस, कण्हेर, मोगरा, अशोक ही उत्तम फुले होत. कांचन, रुई, धोतरा, सेमल, कुडा ही फले विष्णूला वाहू नयेत.१४०. गणपतीला तुळस, देवीला दूर्वा आणि शिवाला काळी व लाल फुले, तसेच केवडा, निम्ब इत्यादि फुले वाहू नयेत. शंकराला बिल्वपत्र आणि पांढरी फुले प्रिय आहेत.१४१. गणपतीला दूर्वा, विष्णूला तुळस इत्यादि सर्व फुले जाणून देवाला संतुष्ट करण्यासाठी श्रद्धापूर्वक अर्पण करावीत.१४२. नैवेद्यानंतर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेने चरु किंवा तूप यांची आहुती द्यावी त्याच मंत्रांनी देवाला फुले वाहावीत आणि हरीची सूक्ताने किंवा स्तोत्राने प्रार्थना करावी. नंतर त्रैवर्णिकांनी एकचित्ताने भक्तीने यथाशक्ती गुरूंनी उपदेशिलेल्या मंत्राचा जप करावा. शूद्रांनी ब्राह्मणाने सांगितलेल्या पौराणिक मंत्रानीच पूजा करावी. नामसंकीर्तन, स्मरण आणि श्रवण यांचा सर्वांनाच अधिकार आहे.१४३.

**द्विजदेवाङ्घ्र्यब्जतीर्थं पेयं धार्यं च मूर्धनि । चतुर्धाध्ययनं कुर्यात्स्ववृत्त्या पोष्यपोषणम् ॥१४४॥**
**स्ववृत्त्या जीवनाभावाद् गुर्वापद्यन्यवार्तया । जीवेतानिन्द्यया नैव हीनवृत्त्या कुटुम्ब्यपि ॥१४५॥**

द्विज+देव+अङ्घ्रि+अब्ज+तीर्थं पेयं मूर्धनि च धार्यम्। चतुर्धा अध्ययनं कुर्यात्। स्व+वृत्त्या पोष्यपोषणं (कुर्यात्)।१४४। स्ववृत्त्या जीवन+अभावात् गुरु+आपदि अनिन्द्यया अन्यवार्तया जीवेत। कुटुम्बी अपि हीनवृत्त्या न (जीवेत)।१४५।

प्रथम ब्राह्मणाचे व नंतर देवाचे चरणतीर्थ घेऊन मस्तकावर शिंपडावे. अध्ययन, अध्यापन, त्याच्या अर्थाचे चिंतन आणि प्रवचन असे चार प्रकारचे अध्ययन करावे. आपल्या वर्णानुसार विहित असलेल्या वृत्तीने अग्नी, गाय, अतिथी, आईवडील, पुत्र, भार्या इत्यादि पोष्यांचे पोषण करावे.१४४.

आपल्या विहित वृत्तीने उपजीविका होत नसेल तर दुसऱ्या चांगल्या वृत्तीचा अवलंब करावा. गृहस्थानेसुद्धा हीनवृत्तीचा आश्रय करू नये. ब्राह्मणाची मुख्य वृत्ती प्रतिग्रह (दान घेणे) आहे. ती अशक्य असल्यास अध्यापन आणि याजन (भिक्षुक, पौरोहित्य) किंवा अयाचित, यायावर, शिल आणि उञ्छ या वृत्ती शास्त्रसंमत आहेत. यायावर म्हणजे रोजच्या रोज धान्याची भिक्षा मागणे, कुसूल म्हणजे बारा दिवसांपर्यंतचा संग्रह करणे. कुम्भि म्हणजे सहा दिवसांचा संग्रह करणे. तीन दिवसांचा संग्रह किंवा निदान उद्याचा तरी संग्रह कलियुगांत करावा असे याज्ञवल्क्यस्मृतीत सांगितले आहे (*कुसूलकुम्भिधान्यो वा त्र्याहिकः श्वस्तनोऽपि वा। कलौ द्विजो न हि भवेदश्ववृत्तिः कथंचन॥*). यांपैकी कोणतीच उपजीविका शक्य नसेल तर क्षात्रवृत्तीने किंवा वैश्यवृत्तीने कुटुम्बाचे पोषण करावे. वृद्ध मातापिता, साध्वी भार्या, शिशु पुत्र यांच्या भरणपोषणसाठी करू नये तेही शंभर वेळा करावे असे मनूचे मत आहे (*वृद्धौ मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत्॥*) विविध स्मृतींतून यावर सविस्तर उहापोह केलेला आहे.१४५.

**कृतसन्ध्यः कृतोपस्थो जानुस्थसकुशाञ्जलिः । सोङ्कारव्याहृतिं देवीं रोदसीदत्तदृग्जपेत् ।१४६।।**
**तां पच्छोऽर्धर्चशः सर्वां वेदान्साङ्गान्स्वशक्तितः । तिष्ठन्नासीनो व्रजन्वानध्यायेऽल्पं जपेत्ततः ।।१४७।।**
**त्रिर्नमो ब्रह्मण इति तर्पयेत्साक्षताञ्जलिः । देवानृषीन् तिलैः पितॄन् स्वगृह्योक्तविधानतः ।।१४८।।**
**यज्ञादिवर्ज्यमाशौचे कर्म मानसिकं चरेत् । यमाग्निपितृभे नन्दा शुक्रार्काहे जनुर्दिने ।।१४९।।**

कृत+सन्ध्यः कृत+उपस्थः जानुस्थ+सकुश+अञ्जलिः स+ओङ्कार+व्याहृतिं पत्+शः अर्ध+ऋचशः सर्वां देवीं रोदसी+दत्त+दृक् जपेत्।१४६। स+अङ्गान् वेदान् स्वशक्तितः तिष्ठन् आसीनः व्रजन् वा, अनध्याये अल्पं, 'त्रिः नमो ब्रह्मणे' इति जपेत्।१४७। स+अक्षत+अञ्जलिः देवान् ऋषीन्, तिलैः पितन् (च) स्व+गृह्य+उक्त+विधानैः तर्पयेत्।१४८। आशौचे यज्ञा+आदि+वर्ज्यं कर्म मानसिकं चरेत्। यम+अग्नि+पितृ+भे नन्दा शुक्र+अर्क+अहे जनुः+दिने,।१४९।

**ब्रह्मयज्ञ -** माध्याह्न संध्या आणि उपस्थान करून डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून ओंजळीत दर्भ घेऊन ती उजव्या गुडघ्यावर ठेवून ॐकार व व्याहृतींसह गायत्रीचा पदशः, अर्धा-अर्धा आणि पूर्ण जप करावा. या वेळी दृष्टी आकाश आणि पृथ्वी यांच्या संधीवर (क्षितिजावर) स्थिर केलेली असावी. यात आश्वलायनसूत्रांत वेगळे विधान सांगितले आहे. उपकर्मात पाण्याच्या कलशांत दर्भ ठेवून ब्रह्माञ्जली करावी असे विधान आहे. स्वशक्त्यनुसार, उठता-बसता किंवा चालताना सर्व वेदांचा पाठ करावा. ज्या दिवशी अनध्याय असेल तेव्हा थोडाच पाठ करावा. मग 'नमो ब्रह्मणे' या मंत्राचे तीन पाठ करावे.१४६-१४७. **पितृतर्पण -** मग आपापल्या गृह्यांत सांगितलेल्या विधानानुसार देव आणि ऋषी यांचे अक्षतांनी आणि पितरांचे तिळांनी तर्पण करावे.१४८. अशौच आले असता यज्ञादि कर्म वर्ज्य आहे. संध्या मानसिक करावी. भरणी (**यम**), कृत्तिका (**अग्नी**) आणि मघा (**पितृ**) या नक्षत्रांना, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या (**नंदा**) तिथींना, आपल्या जन्मदिवशी,(१४९)

**माङ्गल्येऽब्दतदर्धार्धं विवाहव्रतचौलतः । तिलैर्नैमित्तिकमृते तर्पयेन्न गृहे तु न ।।१५०।।**
**भीष्मं माघसिताष्टम्यां दीपाल्यां तर्पयेद्यमम् । नित्यैर्नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत् ।।१५१।।**
**त्रियज्ञाढ्यं वैश्वदेवं कुर्यात्सूनापनुत्तये । ध्याते कुण्डस्थापितेऽग्नौ दीप्तेऽन्नाद्याहुतीर्हुनेत् ।।१५२।।**

माङ्गल्ये विवाह+व्रत+चौलतः अब्द+तत्+अर्ध+अर्धं नैमित्तिकं ऋते तिलैः न तर्पयेत्। गृहे तु (तिलैः) न।१५०। माघ+सित+अष्टम्यां भीष्मं, दीपाल्यां यमं तर्पयेत्। नित्यैः नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत्।१५१। सूना+अपनुत्तये त्रि+यज्ञ+आढ्यं वैश्वदेवं कुर्यात्। कुण्डे स्थापिते ध्याते अग्नौ अन्नादि आहुतीः हुनेत्।१५२।

मंगलकार्यानंतर, विवाहानंतर एक वर्ष, मुंजीनंतर सहा महिने आणि चौलानंतर तीन महिने तिळांनी तर्पण करू नये. नैमित्तिक तिलतर्पणाला दोष नाही. घरी तिलतर्पण करू नये.१५०. माघ शुद्ध अष्टमीला '*वैयाघ्रपादगोत्राय सांकृत्यप्रवराय च। अपुत्राय ददाम्येतज्जलं भीष्माय तर्पणे*' या मंत्राने भीष्माचे आणि यम, धर्मराज, मृत्यू, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र आणि चित्रगुप्त या नावांनी यमाचे तर्पण करावे. निर्णयसिंधूप्रमाणे ज्याचा पिता जिवंत आहे त्यानीसुद्धा भीष्म आणि यम यांचे तर्पण करावे. अमावास्यादि शहाण्णव नित्य श्राद्धे आणि गयादि तीर्थाला जाऊन केलेल्या नैमित्तिक श्राद्धांच्या अनुष्ठानानेच पुत्राचे पुत्रत्व सार्थ होते. जिवंत असतांना आज्ञा पाळण्याने आणि मृत्यूनंतर दर वर्षी अन्नदानाने आणि गयेला जाऊन पिंडदान यांनीच पुत्राची पुत्र ही संज्ञा सार्थ ठरते (*जीवितो वाक्यकरणात्प्रत्यब्दं भूरिभोजनात्। गयायां पिण्डदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता।।*).१५१.

**वैश्वदेव -** पराशरस्मृतीनुसार उखळ, मुसळ, चूल, रांजण आणि झाडू या पाच सूनांचा दोष गृहस्थाश्रमात लागतो. तो स्वर्गाला जाऊ देत नाही. त्याचा परिहार करून आत्मशुद्धी होण्यासाठी देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ ह्या तीन यज्ञांनी युक्त असा वैश्वदेव करावा. अग्नीत हवन केले जाते तो देवयज्ञ, बली दिला जातो तो भूतयज्ञ, पितरांना दिला जातो तो पितृयज्ञ, स्वाध्यायाचे अध्ययन हा ब्रह्मयज्ञ आणि मनुष्यांना दिला जाणारा मनुष्ययज्ञ अशी पाच महायज्ञाची लक्षणे आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितली आहेत (आश्वलायन गृह्यसूत्र ३:१:३). कुण्डात स्थापन केलेल्या अग्नीचे ध्यान करून त्यात अन्नदिकांच्या आहुती समर्पण कराव्यात.१५२.

**प्रातः सायं बलीन्दद्यात् पितृभ्योऽपि बहिर्बलिम् । भूताद्युद्देशतः क्षिप्त्वा काङ्क्षेदतिथिमागतम् ।।१५३।।**
**कमप्यभ्यर्च्य शक्त्यान्नं देयमीश्वरतुष्टये । साद्यान्ताम्ब्वन्नं यतौ तत् स्वल्पमप्यद्रिसिन्धुवत् ।।१५४।।**
**बलावनुद्धृते नाद्यान्नोद्धरेच्च स्वयं बलिम् । नित्यं श्राद्धं चरेद्वान्नं दद्यादद्याच्च पोष्ययुक् ।।१५५।।**
**मन्त्रवत्परिषिच्यार्द्र-हस्ताङ्घ्र्यास्योऽविदिङ्मुखः । दक्षभागे बलीन्दत्वाऽहं वैश्वानर इत्यमुम् ।।१५६।।**
**स्मृत्वापो मन्त्रवत्प्राश्य हुतप्राणाहुतीर्ग्रसेत् । धृतपात्रः प्राणमन्त्रैरजावद्भोजनं चरेत् ।।१५७।।**

प्रातः सायं पितृभ्यः बलीन् दद्यात्। भूतादि उद्देशतः अपि बहिः बलीन् क्षिप्त्वा अतिथिं काङ्क्षेत्।१५३। कं अपि आगतं अभ्यर्च्य ईश्वर+तुष्टये शक्त्या अन्नं दद्यात्। यतौ स+आद्य+अंत+अम्बु+अन्नं तत् स्वल्पं अपि अद्रि+सिन्धु+वत्।१५४। बलौ अनुद्धृते न अद्यात्, स्वयं च बलिं न उद्धरेत्। नित्यं श्राद्धं चरेत्, अन्नं वा दद्यात्। पोष्ययुक् अद्यात्।१५५। मन्त्रवत् परिषिच्य आर्द्र+हस्त+अङ्घ्रि+आस्यः अविदिक्+मुखः दक्षभागे बलीन् दत्वा 'अहं वैश्वानर' इति अमुं स्मृत्वा, मन्त्रवत् प्राश्य, प्राणमन्त्रैः हुत+प्राण+आहुतीः ग्रसेत्। धृतपात्रः अजावत् भोजनं चरेत्।१५६-१५७।

सकाळी व संध्याकाळी बलिहरण करावे. पितरांना बली देऊन भूतादिकांसाठी बाहेर बली टाकावा आणि अतिथीची वाट पाहावी.१५३. त्या समयी जो कोणी मनुष्य येईल त्याची पूजा करून देवाच्या संतोषासाठी त्याला शक्त्यनुसार अन्न द्यावे. भिक्षेला आलेल्या संन्याशाला आधी व नंतर पाण्यासह थोडेही अन्न दिले तर ते पर्वताएवढ्या अन्नाचे आणि समुद्राएवढ्या जलाचे फळ देऊन जाते. यति आणि ब्रह्मचारी हे शिजवलेल्या अन्नाचे धनी आहेत. त्यांना अन्न न देता जेवल्यास चांद्रायण आचरावे. '*यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ। तयोरन्नमदत्वा तु भुक्त्वा चान्द्रायणं चरेत्।।*' (पराशर स्मृति १:४६).१५४. बलिहरणावरील झाकण काढल्यावरच जेवावे. ते स्वतः काढू नये. नित्य श्राद्ध तरी करावे किंवा तन्निमित्त अन्न तरी द्यावे. मग पिता, पुत्र आदि पोष्यांसह भोजन करावे.१५५.

**पात्रधारणमौने तु प्राणाहुत्यूर्ध्वमैच्छिके । तैजसे राजते हैमे ताम्रे जम्ब्वाम्रचम्पके ।।१५८।।**
**रम्भामधूककुटज-पनसोदुम्बरच्छदे । भोक्तव्यं मण्डलोर्ध्वस्थे विधवाव्रतिभिक्षुभिः ।।१५९।।**
**न तैजसेऽखिलैर्वल्ली-पलाशार्कवटादिषु । पीठस्थोऽप्यासनारूढः प्रसृतप्रोष्ठपात्र तु ।।१६०।।**

पात्र+धारण+मौने तु प्राण+आहुति+ऊर्ध्वं ऐच्छिके। मण्डल+ऊर्ध्वस्थे तैजसे, राजते, हैमे, ताम्रे, जम्बु+आम्र+चम्पके रम्भा+मधूक+कुटज+पनस+उदुम्बर+छदे भोक्तव्यम्। विधवा+व्रति+ भिक्षुभिः न तैजसे। अखिलैः वल्ली+पलाश+अर्क+वट+आदिषु (न भोक्तव्यम्)। पीठस्थः आसन+आरूढः प्रसृत+प्रोष्ठ+पात् तु न (भोक्तव्यम्)। १५८-१६०।

**भोजनविधी -** भोजनविधी प्रथम, दिवसां '*सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामि*' आणि रात्री '*ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामि*' या मंत्रांनी अन्नाभोवती पाणी शिंपडावे. नंतर हात, पाय आणि मुख ओले असताना, आग्नेयादि कोणाकडे मुख न करता उजव्या बाजूला आपापल्या उपदेशानुसार '*चित्राय नमः*' इत्यादि मंत्रांनी बली घालावेत. '*अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तं पचाम्यन्नं चतुर्विधम्।।*' (भ.गीता १५:१४) या मंत्राचे अर्थपूर्वक स्मरण करावे. '*वैश्वानरः साधारणशब्दविशेषात्*' या ब्रह्मसूत्रानुसार (१:२:२४) प्रत्यगात्माच होय. त्याचे स्मरण करून, '*अमृतोऽपस्तरणमसि स्वाहा*' या मंत्राने पाणी प्यावे. मग छांदोग्य उपनिषदांत (१:३:३) वर्णन केलेल्या प्राण, अपान आणि व्यान यांच्या स्वरूपाचा विचार करून '*श्रद्धायां निविष्टोऽमृतं जुहोमि शिवोमाविशप्रदाहय*' इत्यादि पाच प्राणमंत्रांनी प्राणाहुती दाताला स्पर्श न होऊ देता गिळाव्यात. मग पात्र धरून ठेवून शेळीसारखे शीघ्र भोजन करावे. प्राणाहुतीपर्यंत पात्र धरून ठेवणे व मौन ही पाळलीच पाहिजेत. नंतर मात्र ती ऐच्छिक आहेत. मंडल (ब्राह्मणांनी चतुष्कोण) करून त्यावर भोजनपात्र ठेवावे. पात्र कांस्य, चांदी, सोने ह्या धातूचे किंवा जांबू, आंबा, चाफा, केळी, महू, कुडा, फणस किंवा औदुंबर यांच्या पत्रावळीवर जेवावे. विधवा, मुंजा आणि संन्यासी यांनी काशाच्या पात्रात जेवू नये. वेली, पळस, रुई, वड इत्यादींची पाने सर्वांनाच वर्ज्य आहेत. पीठावर बसून, स्वस्तिकादि आसन घालून, पाय पसरून किंवा आसनावर पाय ठेवून जेवू नये.१५८-१६०.

**नार्भैर्वध्वोद्वाहमृते नाद्याद्दुष्टैकपङ्क्तिगः । द्वार्भस्माग्न्यप्स्तम्भमार्गैर्-भिन्द्यात्पङ्क्तिं तु संशये ।।१६१।।**
**नाद्यात्पाकाग्निदेवासद्गृहे सन्ध्यातिरात्रिषु । पीतशेषं ग्रासशेषं रात्रिपर्युषितं विना ।।१६२।।**
**तैलाज्यपक्कं शूद्रान्नमुदक्यादिविलोकितम् । केशकीटादियुक्पक्कं व्याद्युच्छिष्टं सदा त्यजेत् ।।१६३।।**
**कुसुम्भालाबुवृन्ताक-कोविदारवटादिकम् । कुस्थानोत्थान्नशाकादि-पलाण्डुलशुनाद्यसत् ।।१६४।।**
**सद्गोलुलायीदुग्धादि सदन्यासां तु गर्हितम् । कांस्येऽसन्नारिकेलेक्षु-रसो गव्यं च ताम्रके ।।१६५।।**

न अर्भैः, उद्वाहम् ऋते वध्वा, न दुष्ट+पङ्क्ति+गः अद्यात्। संशये तु द्वाः+भस्म+अग्नि+स्तम्भ+मार्गैः पङ्क्तिं भिन्द्यात्।१६१। पाक+अग्नि+देव+असत्+गृहे न अद्यात्। सन्ध्या+अतिरात्रिषु (न अद्यात्) पीतशेषं, ग्रासशेषं, विना तैल+आज्य+पक्कं रात्रिपर्युषितं, शूद्रान्नं, उदक्यादि+विलोकितं, केश+कीट+आदि+युक्+पक्कं वि+आदि+उच्छिष्टं सदा त्यजेत्।१६२-१६३। कुसुम्भ+अलाबु+वृन्ताक+कोविदार+वट+आदिकं कुस्थान+उत्थ+शाकादि पलाण्डु+लशुनादि असत्।१६४। सत्+गो+लुलायी+दुग्ध+आदि सत्। अन्यासां तु गर्हितम्। कांस्ये नारिकेल+इक्षु+रसः, ताम्रके गव्यं च असत्।१६५।

मुलांबरोबर एका पात्रात जेवू नये; तसेच पत्नीसहही, लग्नसमारंभाशिवाय एका ताटात जेवू नये. दोषी व्यक्तीच्या पंक्तीत जेवू नये. तसा संशय वाटल्यास दार, भस्म, अग्नी, खांब किंवा मार्ग यांनी पंगत तोडावी.१६१. स्वयंपाकघरात, अग्निशालेत, देवघरात आणि दुष्टघरी जेवू नये. संध्याकाळात, अपरात्री जेवू नये. पिऊन किंवा खाऊन उरलेले, तुपांत किंवा तेलांत तळलेले सोडून रात्रीचे शिळे अन्न, शूद्राचे अन्न, अस्पृश्य स्त्रीने पाहिलेले अन्न, केस, किडे इत्यादींसह शिजवले गेलेले, पक्षी वगैरेनी उष्टावलेले अन्न नेहमीच टाकून द्यावे.१६२-१६३. कुसुंब, भोपळा, वांगी, कांचन, वड इत्यादि, तसेच कुस्थानांत उपजवलेल्या भाज्या, कांदा, लसूण इत्यादि त्याज्य आहेत.१६४. चांगल्या, सवत्सा, चार सडांच्या गाईचे किंवा म्हशीचे दूध चांगले. इतरांचे - गाढवी, उंटीण, मेंढी इत्यादींचे त्याज्य आहे. नारळाचे पाणी आणि ऊसाचा रस काशाच्या भांड्यातून घेऊ नये. तसेच दूध तांब्याच्या पात्रात ठेवू नये.१६५.

**गुडः सदध्यार्द्रकोऽसन् केवलं लवणं त्वसत् । श्वोदक्यापतिताद्यारश्रवणे तद्विलोकने ।।१६६।।**
**भुक्तौ परस्परस्पर्शे नाद्यात्पङ्क्तिस्थ उत्थिते । गुरून्विनोलूखलादेर् नाद्याद्यावद्ध्वनि द्विज ।।१६७।।**
**नष्टे दीपे न भोक्तव्यं न मूत्राद्युत्सृतौ भुजिः । लेह्याद्यसद्धस्तदत्तं नोच्छिष्टं भाजने न्यसेत् ।।१६८।।**
**ग्रसेदास्याविकारेण ग्रासानष्टौ यतिर्वनी । षोडश द्वात्रिंशदन्यो वर्णीष्टं मधुरं द्रवम् ।।१६९।।**
**प्राङ्मध्येऽम्लादिकठिनं तिक्ताद्यन्ते द्रवं ह्यपि । सर्वं सशेषमश्नीयात् पायसाज्याब्धिजैर्विना ।।१७०।।**

स+दधि+आर्द्रकः गुडः असत्। केवलं लवणं असत्। श्व+उदक्या+पतित+आदि+आर+श्रवणे, तत्+विलोकने, भुक्तौ परस्पर+स्पर्शे, गुरून् विना पङ्क्तिस्थ उत्थिते, यावत् उलूखल+आदेः ध्वनि, न अद्यात्।१६६-१६७। नष्टे दीपे न भोक्तव्यम्। मूत्रादि उत्सृतौ भुजिः न। लेह्यादि हस्त+दत्तं असत्। उच्छिष्टं भाजने न न्यसेत्।१६८। यतिः आस्य+अविकारेण अष्टौ ग्रासान् ग्रसेत्। वनी षोडश, अन्यः द्वात्रिंशत्, वर्णी इष्टम्। प्राक् मधुरं द्रवं,।१६९। मध्ये अम्लादि कठिनं, अन्त्यं द्रवं (भोक्तव्यम्)। पायस+आज्य+अब्धिजैः विना सर्वं सशेषं अश्नीयात्।१७०।

दही किंवा आल्यात मिसळलेला गूळ त्याज्य आहे. नुसते मीठ खाऊ नये. कुत्रे, विटाळशी, पतित इत्यादींचा आवाज कानांवर पडला तर किंवा ते दृष्टीसमोर आल्यास, जेवताना एकमेकांना स्पर्श झाल्यास, गुरूंवाचून पंगतीतील एकही व्यक्ती उठल्यास जेवण सोडून उठावे. उखळ, मुसळ किंवा जाते यांचा आवाज होत असताना जेवण थांबवावे.१६६-१६७. जेवताना दिवा विझला तर जेवू नये. मलमूत्र उत्सर्ग झाल्यास जेवू नये. चटणी, श्रीखंड इत्यादि लेह्य पदार्थ हातांनी वाढले तर निषिद्ध आहेत. उष्टे ताटात ठेवू नये.१६८. तोंड वेडवाकडे न करता त्यात मावतील एवढेच घास घ्यावेत. संन्याशाने आठ घास घ्यावेत. वानप्रस्थाने सोळा आणि गृहस्थाने बत्तीस घास घ्यावेत. ब्रह्मचाऱ्याने हवे तितके जेवावे. सुरुवातीला गोड आणि पातळ पदार्थ खावेत,(१६९) मध्ये आंबट आणि कठीण पदार्थ आणि शेवटी कडसर, तुरट आणि पातळ पदार्थ खावेत. दूध, तूप आणि मीठ सोडून सर्व पदार्थ पानांत थोडे ठेवून खावेत.१७०.

**नाद्याद्व्रताऽहेर्कपर्व-नक्तं भूताष्टमी दिवा । तलप्रसृतशाखाभिर् भुक्तं फूत्कारतोऽप्यसत् ।।१७१।।**
**त्यक्त्वोच्छिष्टं क्षितौ मन्त्रात् पीतापोशनशेषकम्। कौ सिक्त्वा रौरव इति मन्त्राच्छुद्धकरास्यपात् ।।१७२।।**
**हस्तोद्धृष्टाम्बु सिक्त्वाक्ष्णोर्जपेच्छर्यातिमित्यपि । आतापिं चेति ताम्बूलं सत्पञ्चत्र्यैकपूगयुक् ।।१७३।।**
**साङ्गं प्राग्ब्रह्मणे दद्यादद्यान्नदोधवा यतिः । चूर्णाङ्घ्र्यग्रशिरोनं सत्पर्णं चाहोवशेषकम् ।।१७४।।**

व्रत+अहे अर्कपर्व+नक्तं, भूत+अष्टमी दिवा न अद्यात्। तल+प्रसृत+शाखभिः, फूत्कारतः अपि भुक्तं असत्। १७१। मन्त्रात् उच्छिष्टं क्षितौ त्यक्त्वा, पीत+आपोशन+शेषं 'रौरव' इति मन्त्रात् कौ सिक्त्वा, शुद्ध+कर+आस्य+पात् ।१७२। हस्त+उद्धृष्ट+अम्बु अक्ष्णोः क्षिप्त्वा, 'शर्यातिं' इति जपेत्। 'आतापिं' च इति अपि। ताम्बूलं पञ्च+त्रि+एक+पूग+युक् सत्।१७३। प्राक् स+अङ्गं ब्रह्मणे दद्यात्। अदः अधवा, यतिः न अद्यात्। पर्णं चूर्ण+अङ्घ्रि+शिरा+ऊनं सत्। अहः अवशेषकं...।१७४।

एकादशीच्या दिवशी, अमावास्येला रात्री तसेच अष्टमी आणि चतुर्दशीला दिवसा, जेवू नये. तळहाताने किंवा पसरलेल्या बोटांनी किंवा फुरके मारून जेवणे निषिद्ध आहे.१७१. '*यजमानकुले जाता*' या मंत्राने उच्छिष्ट भूमीवर टाकून, '*रौरवे पूयनिलये*' या मंत्राने आपोशनाचे शेष पाणी जमिनीवर टाकावे. नंतर हात, तोंड आणि पाय धुवून(१७२) '*शर्यातिं च सुकन्यां च च्यवनं शक्रमश्विनौ। भोजनान्ते स्मराम्येतान्यतश्चक्षुर्न हीयते।*' या मंत्राचा जप करीत दोन्ही हातांनी पाणी डोळ्यांवर शिंपावे. मग '*आतापिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्वाशेषं। सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छन्त्वरोगं मम चास्तु देहे।।*' हा मंत्र म्हणत पोटावर हात फिरवावा.१७३. पाच, तीन किंवा एका सुपारीचा विडा ग्राह्य आहे. त्रयोदशगुणी विडा आपण घेण्यापूर्वी ब्राह्मणाला द्यावा. विधवा आणि संन्यासी यांनी विडा खाऊ नये. विड्यासाठी नागवेलीचे पान न चुरलेले, देठ आणि शिरा काढलेले असावे. दिवसाचा उरलेला 'भाग' पुढच्या श्लोकाशी संबंधित आहे.१७४.

**नयेत्पुराणमननात् ततो नक्तं कृतक्रियः । स्वपेद्यामोर्ध्वं द्वियामं विष्णवर्पितसमक्रियः ।।१७५।।**
**सुमुहूर्तकृते तल्पे स्तुवन्निट्सुखशाय्यहीन् । त्रिसन्ध्ये न स्वपेद्भूत्यां धान्येऽह्न्यमरगोगृहे ।।१७६।।**
**न श्मशानाध्ववल्मीक-घोरदेश उदक्शिराः । नग्नो नोर्ध्वं देवगुर्वोः प्रवासे प्राक्पदः स्वपेत् ।।१७७।।**
**कार्या निशाद्ययामान्तं सङ्कटान्तरिता क्रिया । नैशा निशीथपर्यंतं प्रायश्चित्तं ततः परम् ।।१७८।।**

अहः अवशेषकं पुराण+मननात् नयेत्। ततः कृत+क्रियः नक्तः विष्णु+अर्पित+सम+क्रियः याम+ऊर्ध्वं द्वि+यामं स्वपेत्।१७५। सु+मुहूर्त+कृते तल्पे निट्+सुखशायी+अहीन् स्तुवन् (स्वपेत)। त्रि+सन्ध्ये, भूत्यां, धान्ये, अह्नि अमर+गो+गृहे,।१७६। श्मशान+अध्व+वल्मीक+घोरदेशे उदक्+शिराः, नग्नः, देव+गुरोः ऊर्ध्वं न (स्वपेत)। प्रवासे प्राक्+पदः स्वपेत्।१७७। सङ्कट+अन्तरिता क्रिया निशा+आद्य+याम+अन्तं कार्या। नैशा निशीथ+पर्यन्तम्। ततः परं प्रायश्चित्तम्।१७८।

उरलेला दिवस पुराणाच्या चिंतनात घालवावा. नंतर रात्रीची संध्या आणि पूजा करून दिवसभराची सर्व कर्मे विष्णूला अर्पण करावीत. भगवदुक्तीला अनुसरून आपण जे जे करतो, जे खातो, हवन करतो, दान करतो, तप करतो ते सर्व भगवंताला अर्पण करावे (*यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुषव मदर्पणम्।।* भ.गीता ९:२७). एक प्रहर रात्रीनंतर मधले दोन प्रहर झोप घ्यावी (म्हणजे सूर्योदयापूर्वी एक प्रहर उठावे).१७५. झोपेसाठी चांगल्या मुहूर्तावर केलेली खाट (पलंग) असावी. रात्र, सुखशायी (*अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः। कपिलो मुनिरास्तीकः पश्चैते सुखायिनः।।*) आणि सर्पांची (*यो जरत्कारुणो जातो..*) स्तुती करून निजावे. सकाळ, माध्याह्न आणि सायंकाळ ह्या तीन संध्याकाळात झोपू नये. राखेवर, धान्यावर, दिवसा, देवघरात, गोठ्यात,(१७६) श्मशानात, मार्गावर, वारुळाजवळ, भयाण जागी, उत्तरेला डोके करून, नागव्याने किंवा देव आणि वडिलांपेक्षा उंच जागेवर झोपू नये. प्रवासांत पूर्वेला पाय करून झोपावे.१७७. संकटामुळे न घडलेली दिवसाची विहित कर्मे रात्रीच्या पहिला प्रहर संपण्यापूर्वी करावीत. रात्रीची विहित कर्मे मध्यरात्रीपूर्वी करावीत. त्यानंतरही न घडल्यास प्रायश्चित्त घ्यावे.१७८.

**कर्मवैगुण्यादिदोषे लोपादावपि सर्वशः । प्रायश्चित्तं चरेद्विद्वान् यथावन्नान्यथा शुचिः ॥१७९॥**
**स्वर्क्षे स्वजायामृतूर्ध्वं शुद्धामुपगमेद्रहः । प्राक्चतुर्निट्श्राद्धतत्प्राग् दिनाहोव्रतपर्वसु ॥१८०॥**
**जन्माहाद्यष्टमीभूत-मूलान्त्यपितृभेषु नो । कैश्चिदुक्तं दशाब्दोर्ध्वं वर्णी स्यादृतुगः सदा ॥१८१॥**
**द्वेषादिनोपगच्छेद्यो नर्तौ स भ्रूणहाप्यृतौ । यो विदेशं व्रजेद्वन्ध्यां कन्यापुत्रान्वितामृते ॥१८२॥**

कर्म+वैगुण्य+आदि दोषे, लोपादौ अपि सर्वशः, विद्वान् यथावत् प्रायश्चित्तं चरेत्। अन्यथा शुचिः न।१७९। सु+अर्क्षे स्व+जायां शुद्धां रहः उपगमेत्। प्राक् चतुः+निट् श्राद्ध+तत्+प्राक्+दिन+अहो+व्रत+पर्वसु,।१८०। जन्म+अह+आदि+अष्टमी+भूत+मूल+पितृ+भेषु नो। कैश्चित् दश+अब्द+ऊर्ध्वं उक्तम्। सदा ऋतुगः वर्णी स्यात्।१८१। द्वेष+आदिना यो ऋतौ न उपगच्छेत स भ्रूणहा। यो ऋतौ, कन्या+पुत्र+अन्विता ऋते, विदेशं व्रजेत् अपि (भ्रूणहा)।१८२।

कर्म यथासांग न घडणे इत्यादि दोषांसाठी किंवा कर्माचा लोप झाला असता जाणीवपूर्वक शास्त्रानुसार योग्य ते प्रायश्चित्त घ्यावे. अन्यथा तो शुद्ध होत नाही.१७९. शुभ नक्षत्री, ऋतुकालानंतर शुद्ध झालेल्या स्वपत्नीसह एकांतात संभोग करावा. हे संभोगाला प्रवृत्त करणारे विधान नाही तर संभोगाला मर्यादा घालणारी परिसंख्या आहे. संभोग केलाच पाहिजे असे नाही. तर संभोग केलाच तर तो कुणाशी, कधी, कुठे करावा याचे नियमन आहे. ऋतुकालातील पहिल्या चार रात्री, श्राद्ध व त्याआधीचा दिवस, दिवसा, व्रतदिनी, पर्वकाळी,(१८०) जन्मादि तिथीदिवशी, अष्टमी, चतुर्दशी, मूळ, रेवती, मघा या नक्षत्रात संभोग वर्ज्य आहे. दहा वर्षांनंतर कन्येला रजस्वलत्व येते असे कांहीचे म्हणणे आहे. त्यापूर्वीच तिचा विवाह करावा. वरील नियम पाळून ऋतुकाळातच स्त्रीसंग करणारा गृहस्थही ब्रह्मचारी होतो.१८१. द्वेषादिकांमुळे जो ऋतुकाळात भार्येशी संग करीत नाही त्याला भ्रूणहत्येचे पाप लागते. तसेच ऋतुकाळात दूरदेशी जाणाऱ्यालाही भ्रूणहत्येचा दोष सांगितला आहे. पत्नीला मुले-मुली असतील किंवा ती वंध्या असेल तर हा दोष नाही.१८२.

**षोडशाहमृतुः कन्याऽसमेऽत्राह्नि समे सुतः । भवेन्निषेकसमये यादृक्चित्तविकल्पना ।।१८३।।**
**भ्रूणस्तद्वदतस्ताभ्यां सत्त्वं धार्यं हिताप्तये । पितृत्राता हि सत्पुत्रः प्रायोऽपुत्राः पतन्त्यधः ।।१८४।।**
**पितृतारक एकोऽपि सत्पुत्रोत्र ध्रुवादिवत् । किं कार्यं बहुभिर्दुष्टैर् धार्तराष्ट्रशतोपमैः ।।१८५।।**
**तारकोऽत्रैवमाचारः प्रोक्तः शाक्त्यादिसंमतः । विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भव ।।१८६।।**
**उभयीसिद्धिभाजस्ते य आचारं चरन्त्यमुम् । स्वाचारहीना दण्ड्याः स्युर् ब्राह्मणास्तु विशेषतः ।।१८७।।**

षोडश+अहं ऋतुः। अत्र असमे कन्या, समे सुतः। निषेक+समये यादृक् चित्त+विकल्पना भवेत्,।१८३। तत्+वत् भ्रूणः। अतः ताभ्यां हित+आप्तये सत्त्वं धार्यम्। प्रायः अपुत्राः अधः पतन्ति।१८४। अत्र ध्रुव+आदि+वत् एकः अपि सत्पुत्रः पितृतारकः। बहुभिः धार्तराष्ट्र+शत+उपमैः दुष्टैः किं कार्यम्?१८५। अत्र प्रोक्तः शाक्त्य+आदि+संमतः आचारः एव तारकः। विचार+आचारं आदाय कर्म कुर्वन् सुखी भव।१८६। ये अमुं आचारः चरन्ति ते उभयी+सिद्धि+भाजः। स्व+आचार+हीनाः दण्ड्याः स्युः। ब्राह्मणाः तु विशेषतः।१८७।

रजोदर्शनानंतर सोळा दिवसांचा ऋतुकाल असतो. त्यात विषम दिवशी कन्या व सम दिवशी पुत्र होतात. संभोगसमयी मनाची जशी चांगली-वाईट अवस्था असते तसेच मूल होते. यासाठी दंपतीनी मैथुनाच्या काळी चांगली संतती होण्यासाठी सत्त्ववृत्ती धारण करावी. बहुतेक पुत्रहीन अधोगतीला जातात.१८४. मनुष्यलोकात ध्रुवादिकांप्रमाणे एकसुद्धा सत्पुत्र पित्याला तारून नेतो. धृतराष्ट्राच्या शंभर मुलांसारखे दुष्ट पुत्र काय कामाचे?१८५. इथे निरूपिलेला पराशरादि मुनींनी पुरस्कारलेला आचारच तारक आहे. अनाचार हा मालिन्याला कारण आहे आणि अति आचार मूर्खपणाचा ठरू शकतो (*अनाचारस्तु मालिन्यमत्याचारस्तु मूर्खता। विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भवेत्।।*) ह्या स्मृतीच्या मार्गदर्शनानुसार विचारपूर्ण आचार करून कर्म करावे आणि सुखी व्हावे.१८६. जे हा आचारधर्म पाळतात ते ऐहिक आणि आमुष्मिक सिद्धी पावतात. आपला आचार सोडणारे, विशेषतः ब्राह्मण, शिक्षेला पात्र आहेत.१८७.

**इति गुरुमुखलब्धं धर्ममेनं चरन्स । द्विज इह सुखमिष्टं साधु भुक्त्वाऽप मोक्षम् ।**
**तत उदित इहासौ तिष्यलुप्तोऽपि धर्मो । विभुरपि लघुसिद्ध्यै भक्तियोगं ततान ।।१८८।।**

**।। इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मकाण्डकथनं नाम अष्टमोध्यायः ।।**

**।। आदितोऽष्टादशोऽध्यायः ।।**

इति गुरु+मुख+लब्धं एनं धर्मं चरन् सः द्विजः इष्टं साधु सुखं भक्त्वा मोक्षं आप। ततः असौ तिष्य+लुप्तः अपि धर्मः इह उदितः। विभुः अपि लघु+सिद्ध्यै भक्तियोगं ततान।१८८।

साक्षात् श्रीगुरूंच्या मुखातून लाभलेल्या ह्या धर्माचे आचरण करून तो ब्राह्मण ह्या जन्मात अभीष्ट आणि धर्म्य अशा सुखाचा उपभोग घेऊन अंती मोक्ष पावला. कलिकाळांत लुप्तप्राय झालेला हा धर्म तेव्हापासून प्रकट झाला. अशा रीतीने क्रिया, कारक, फल आदिरूप प्रपञ्च ज्या निष्प्रपंच आत्म्यावर भासतो त्या आत्म्याचे यथार्थ रूप दर्शविण्यासाठी अधिकारानुसार चित्तशुद्धीसाठी ह्या कर्मकाण्डाची रचना झाली. त्यानंतर कलियुगांत लवकर सिद्धीला जाणारा भक्तियोग मांडला आहे.१८८.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा कर्मकांडाचा पाचवा आणि आधीपासून अठरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुदेव दत्त।**

# ।। एकोनविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**कर्मयोगं ज्ञानयोग-सहायं चित्तशोधनम् । उक्त्वापि भगवान्कस्माद् भक्तियोगं जगौ वद ।।१।।**

नामधारक उवाच। ज्ञान+योग+सहायं चित्त+शोधनं कर्म+योगं उक्त्वा अपि भगवान् भक्ति+योगं कस्मात् जगौ? वद।१।

श्रीगणेशाय नमः। *पांच अध्यायांत श्रीगुरु नित्यकर्म उपदेशिती। जेणेचि पाविजे द्विजांनी योग्यता आणि चित्तशुद्धि ।। श्रद्धा-भक्ति-ध्यानयोगे ज्ञान उपजे सांगे श्रुति।* (कैवल्य उपनिषत् २) *जयांचे चित्त शुद्ध तयांलागीं ध्यानासाठी भक्ति सांगती।। वंध्येच्या कुशीं पुत्रजन्म तशी शुष्क काष्ठा पालवी। दावुनि द्विजाचे कुष्ठ नासती एकोणिसाव्या अध्यायी।* नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, चित्तशुद्धीद्वारा ज्ञानयोगाला साह्यभूत असणारा कर्मयोग श्रीगुरूंनी सांगितला. मागच्या अध्यायात ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाची प्राप्ती करून देणाऱ्या आचारधर्माचे सार सांगून तो कसा मोक्षपर्यवसायी आहे तेही दाखविले. आता पुन्हा ह्या भक्तियोगाचे निरूपण भगवंतांनी का केले आहे?१.

सर्व साधनांचे कारणरूप भक्तीच या परमार्थात उत्तमोत्तम मार्ग आहे. या भक्तीचे स्वरूप विशद करताना श्रीस्वामिमहाराजांनी भक्तिमार्गातील दहा भूमिका दाखविल्या आहेत.

१. '**प्रथममसङ्गतया भगवदुद्देशेन स्वाश्रमोचित कर्मानुष्ठानम् ।**'

परमेश्वरप्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान हीच भक्तिमार्गाची पहिली भूमिका आहे. असा कर्मयोग ज्ञान व भक्ती या दोन्हींचा पायाच आहे. ज्ञानेश्वरमाउलींच्या मते कर्म करताना कर्तृत्वाचा अभिमान आणि फलाचा अभिलाष हे दोन बंध आहेत. 'तैसा कर्तृत्वाचा मद। आणि कर्मफळाचा आस्वाद। या दोहोंचेही नांव बंध। कर्माचा कीं।।' हा दुहेरी बंधांत न सांपडता केलेल्या कर्माने चित्तशुद्धी होते. ही भक्ती आणि ज्ञान या दोन्ही योगांना उपकारक आहे.

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्तिरेवानुत्तमात्र सर्वसाधनकारिणी । कर्मज्ञस्याप्यभक्तस्य मोघं कर्मेत्यथाब्रवीत् ।।२।।**

अत्र सर्व+साधन+कारिणी भक्तिः एव अनुत्तमा। अभक्तस्य कर्मज्ञस्य अपि कर्म मोघं इति। अथ (भक्तियोगं) अब्रवीत्।२।

२. **ततो महत्सेवा**.

असे ईश्वराच्या आराधनेसाठी स्वधर्माचे आचरण केल्याने ईश्वराची कृपा होते आणि ईश्वराभिन्न सद्गुरूंची प्राप्ती होते. संतांची किंवा सद्गुरूंची सेवा ही भक्तीची दुसरी भूमिका होय. (*ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात्सताम्। ईशप्रसादस्तद्रूपः सुलभश्चात्र सद्गुरुः।।*)

३. **ततस्तत्कृपा**.

संत आणि सद्गुरू यांच्या कृपेने ज्ञानाचे सर्व प्रतिबंध दूर होतात आणि चित्तातील सर्व दुर्भावना मावळतात. आणि मुक्तिदायक विज्ञान क्षणमात्रात प्रकट होते. '*सद्गुरोः संप्रसादेऽस्य प्रतिबंधक्षयस्तथा। दुर्भावनातिरस्काराद्विज्ञानं मुक्तिदं क्षणात्।।*' सद्गुरुकृपा ही भक्तीची तिसरी भूमिका आहे.

४. **ततस्तद्धर्मश्रद्धा**.

त्यानंतर त्यांच्या धर्मावर दृढ श्रद्धा होते.

५. **ततो भगवत्कथाश्रवणम्**.

पाचव्या भूमिकेत भगवंतांच्या कथांचे श्रवण घडते.

६. **ततो भगवति रतिः**

भगवंताच्या लीलांचे आणि गुणांचे श्रवण झाले की त्यांच्या पादपद्मी प्रेम उपजते.

७. **तया च देहद्वयविवेकज्ञानम्**.

ईश्वराच्या प्रेमातून स्थूल, सूक्ष्म, कारण या देहांचा विवेक होतो आणि आपण त्यापासून वेगळे असल्याची जाणीव होते.

८. **ततो दृढा भक्तिः**

मग भक्ती दृढ होते.

९. **ततो भगवत्तत्त्वज्ञानम्** .

दृढ भक्तीने भगवंताचे यथार्थ ज्ञान होते.

१० **ततस्तत्कृपया सर्वज्ञत्वादिभगवद्गुणाविर्भावः**

मग त्याच्याच कृपेने सर्वज्ञत्वादि त्याच्या गुणांचा आविर्भाव होतो. ही भक्तीची चरम भूमिका होय.

साहजिकच भक्तीचे परमश्रेष्ठत्व आणि सर्वसाधनकारित्व सिद्ध होते. भक्तीच्या अभावी तत्त्वज्ञानेही केलेले कर्म व्यर्थच आहे. ईशावास्योपनिषदात केवळ कर्माची उपासना करणारे गाढ अंधःकारांत प्रवेश करतात (*अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते।*९.) बृहदारण्यक उपनिषदांत (१:१५:१६) कर्माने पितृलोकाच्या प्राप्तीचे वर्णन असले तरी परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याच्या विषयी ते निरर्थकच ठरते. पितृलोकादि कर्माने प्राप्त होणारे लोक हे नश्वर आहेत; (छांदोग्य उ. ८:१:६). याउलट भगवत्प्रसादाने लभ्य असे ज्ञानरूप फल नित्य आहे असेच श्रुतींचे प्रतिपादन आहे. एका भक्तीनेच मोक्ष लाभतो असे सांगणाऱ्या अनेक श्रुती (*नान्यः पन्था विद्यतेऽयनाय।* श्वेताश्वतर उ.३:८) आणि स्मृती आहेत. '*तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते।।*' भ.गीता १०:१०. माझे निरंतर अनुसंधान ठेवून प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्या भक्तांना मी बुद्धियोग देतो, ज्यायोगे ते मला येऊन मिळतात.' '*पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।*' भ.गीता ८:२२. 'हे पार्था, तो परमपुरुष अनन्य भक्तीनेच लाभतो.' '*भक्त्या मामभिजानन्ति यावन्यश्चास्मि तत्त्वतः।*' भ.गीता १८:७५. या सर्व प्रमाणांवरून श्रीगुरूंनी चित्तशुद्धीकारक कर्मयोगानंतर ज्ञानप्रद भक्तियोगाचे निरूपण केले आहे.२.

**त्रिभिर्योगपथैरेव परस्परसहायकैः । ब्रह्माद्वन्द्वं समं शान्तं गम्यते नैकयोगतः ।।३।।**

त्रिभिः परस्पर+सहायकैः योगपथैः एव अद्वन्द्वं समं शांतं ब्रह्म गम्यते। न एक+योगतः।३।

कर्म, भक्ती आणि ज्ञान या तीनही परस्परांना साह्यभूत योगांच्या समुच्चयानेच निर्द्वंद्व, सम आणि शांत ब्रह्माची प्राप्ती होते. कोणत्याही एकाच योगाने नाही. हा फार महत्त्वाचा सिद्धांत श्रीस्वामिमहाराजांनी इथे मांडला आहे. हे तीनही मार्ग वेगवेगळे नसून एकमेकांना पूरक आहेत. त्या तिन्हींचा अवलंब क्रमशः केल्यानेच परमार्थ फलदायी होतो. केवळ कर्मयोगाचेच अनुष्ठान केले तर चित्तशुद्धी होईल; पण आत्मसाक्षात्कारासाठी आवश्यक ते ज्ञान होणार नाही. तसेच '*शास्त्रे परे च निष्णात*' अशा आचार्यांच्या प्रसादाने अपरोक्ष ज्ञान जरी झाले तरी त्याची धारणा होत नाही. असंभावना, विपरीतभावना इत्यादि प्रतिबंध चित्ताच्या मालिन्यामुळे अपरोक्ष ज्ञानालाही परोक्षासारखे करून टाकतात. आणि अपरोक्षसंस्कारसुद्धा भ्रमनिवृत्तीला असमर्थच ठरतो. परंतु भगवंताच्या भक्तीने चित्तातील मल समूल नष्ट झालेल्या आणि भगवंताकडूनच प्राप्त झालेल्या अपरोक्ष ज्ञानरूपी प्रसाद पावलेल्यांना मात्र कांही यत्न न करताच मोक्ष अगदी हाताच्या तळव्यावरच्या आवळ्यासारखा सुलभ आहे. म्हणूनच यमाने नचिकेताला सांगितले आहे की, ज्याला हा परमात्मा निवडतो त्यालाच तो प्राप्त होतो. (*यमेवैष वृणुते तमेव लभ्यः।* कठ उ. १:२:२३) श्वेताश्वतर उपनिषदांतही (६:२३) हाच सिद्धांत दृढ केला आहे. ज्याची देवावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच गुरूवर आहे त्यालाच हे अर्थ प्रकाशतात (*यस्य देवे परा भक्ति यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः।।*).३.

**श्रद्धालुः सात्त्विको भक्तो नितरां भगवत्प्रियः । सकार्ममपि तद्भिन्नं शश्वत्क्षिपति दुर्भवे ।।४।।**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मण्यपि कर्म यः । स लोके भक्तिमान्धीमान् मुच्यते कर्मबन्धनात् ।।५।।**

श्रद्धालुः सात्त्विकः भक्तः नितरां भगवत्+प्रियः। तत्+भिन्नं सकार्मं अपि शश्वत् दुः+भवे क्षिपति।४। यः कर्मणि अकर्म पश्येत अकर्मण्यपि कर्म (पश्येत्) सः लोके भक्तिमान् धीमान् कर्म+बन्धनात् मुच्यते।५।

देवाला प्रिय होण्याचा भक्ती हाच एक उपाय आहे. माझ्या ठायी चित्त स्थिर करून जे परम श्रद्धेने, निरंतर ध्यान-भजनाने माझी उपासना करतात ते मी सर्व योग्यांत श्रेष्ठ मानतो (*मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते। श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः।।* भ.गीता १२:२) या भगवंतांच्या वचनावरून श्रद्धावान् आणि सात्त्विक भक्त त्यांना अत्यंत प्रिय आहे हे दिसते. चित्तांत भक्ती नसेल तर कितीही कर्मशूर झाला तरी त्याला ईश्वर पुनःपुनः दुःखमय अशा जन्ममरणरूपी संसारांत फिरवत ठेवतो. कठोपनिषदांत (१:२:५) सांगितल्याप्रमाणे अज्ञानमूलक कर्मांतच मग्न असलेले, स्वतःला पंडित मानणारे आंधळ्याच्या मागे जाणाऱ्या आंधळ्यांसारखे मूढ वेड्यावांकड्या मार्गांत फिरून संसारदुःख भोगतात. '*अविद्यायामन्तरे वर्तमानः स्वयं धीराः पण्डितम्मन्यमानाः। दन्द्रम्यमाणाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः।।*' भगवद्गीतेतही श्रीकृष्ण ह्याचीच पुष्टी करतात. त्या (आसुरी प्रवृत्तीच्या) द्वेषी, क्रूर नराधमांना मी वरचेवर संसारात अशुभ आणि आसुरी योनीत टाकतो (*तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु।।*).४.

हा श्रीमद्भगवद्गीतेतील (४:१८) श्लोकाचा अनुवाद आहे. लोहचुंबक आपल्या केवळ सान्निध्याने लोहांत गती निर्माण करतो. तसाच हा प्रत्यगात्मा (जीवात्मा) बुद्धी आणि इंद्रियांचा चालक आहे म्हणून त्यालाच '**कर्म**' ही संज्ञा दिली आहे. चालक असूनही त्याला त्यापासून कांहीही अभिमानादि विकार होत नाहीत. अशा आत्म्याशी इन्द्रियांकडून होणाऱ्या क्रियारूपी कर्माचा कांहीच संबंध नसतो.

**भक्तियोगमयं तस्य भक्तिगम्यस्य चेष्टितम् । शृणु तस्मिन्दृढा भक्तिः पूता यच्छ्रवणाद्भवेत् ।।६।।**

तस्य भक्ति+गम्यस्य भक्ति+योग+मयं चेष्टितं शृणु यत्+श्रवणात् पूता तस्मिन् दृढा भक्तिः भवेत्।६।

हाच संबंधाचा अभाव म्हणजे '**अकर्म**'. अर्थात् सर्व कर्माच्या चालक आत्म्याशी बुद्धी, इंद्रिये इत्यादींच्याकडून होणाऱ्या कर्माशी कांहीच संबंध नाही असे जो जाणतो तोच खरा बुद्धिमान. तसेच बुद्धी, इंद्रिये इत्यादि जड वस्तूंच्या ठायीच (**अकर्मणि**) जो जाणणे, ऐकणे, पाहणे इत्यादि कर्मे पाहतो तोच खरा बुद्धिमान. सर्वसाधारण जीवमात्र बुद्धी, इंद्रिये आदि उपाधीशी तादात्म्य झाल्याने आत्म्यावर (स्वतःवर) कर्तृत्वाचा आरोप करून भ्रमांत पडतात. *प्रकृति करी कर्मे । तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ।।* ज्ञानेश्वरी १८:३२६।।. जो विवेकी आहे, खरा शहाणा आहे, तो कर्माच्या ठिकाणी अकर्म पाहतो आणि अकर्माच्या ठिकाणी कर्म पाहतो. आपण बसलेली आगगाडी फलाटावरच उभी असूनही शेजारची गाडी सुटली की आपली गाडीच उलट दिशेने चालू लागल्याचा दृष्टिभ्रम होतो. तसाच अविद्येच्या मोहात सापडलेला जीव आपल्या ठिकाणी कर्म पाहतो. पण ते इंद्रियादि जड प्राकृतिक उपाधीचे (अकर्माचे) आहे असे जाणणारा बुद्धिमानच कर्मबंधांतून सुटतो. मोक्ष पावतो.५.

**भक्तीची व्याख्या -** त्या भक्तिगम्य श्रीगुरूंच्या भक्तियोगाने भरलेल्या लीला ऐक, ज्या ऐकून चित्त शुद्ध होऊन त्यांच्या ठायी दृढ भक्ती जडते. भक्ती म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी अनुरक्ती. **भज** धातूपासून हा शब्द झालेला आहे. *भज* या धातूला क्तिनि प्रत्यय लावून भक्ती हा शब्द होतो. हा भावात्मक घेतला तर *भजन* असा अर्थ होतो; तोच अधिकारार्थी घेतला तर ज्या क्रियेत जीव आणि ईश्वर वेगळे असतात (*विभेज्येते*) ती भक्ती; आणि करणार्थी भक्ती म्हणजे जिच्या योगाने कामादि दोषांचे भर्जन होते (*भज्यन्ते*) ती भक्ती.६.

**भिक्षां सशिष्यगुरव एकैकः प्रत्यहं ददौ । भास्कराख्यो द्विजो दीन आययौ तत्र भक्तिमान् ।।७।।**
**आदाय गुरवे भिक्षां दातुकामो गुरुप्रियः । स त्रिपुंभुक्तिपर्याप्तं तण्डुलादिकमाप तम् ।।८।।**
**तद्दिने केनचिद्दत्ता भिक्षा श्रीगुरवे वरा । शिष्यभक्तयुजे तत्र सोऽपि भोक्तुं ययौ द्विजः ।।९।।**
**सायमेत्य मठे भिक्षा-द्रव्यमादाय स द्विजः । सुष्वापैवं त्रिमासं स तत्र तस्थौ सुभाविकः ।।१०।।**

स+शिष्य+गुरवे प्रति+अहं एक+एकः भिक्षां ददौ। तत्र भास्कर+आख्यः दीनः भक्तिमान् द्विजः आययौ।७। सः गुरु+प्रियः गुरवे भिक्षां दातुकामः त्रि+पुं+भुक्ति+पर्याप्तं तण्डुल+आदिकं आदाय तं आप।८। तत् दिने केनचित् शिष्य+भक्त+युजे श्रीगुरवे वरा भिक्षा दत्ता। सः द्विजः अपि तत्र भोक्तुं ययो।९। सायं एत्य सः द्विजः भिक्षा+द्रव्यं आदाय मठे सुष्वाप। एवं सः सुभाविकः तत्र त्रि+मासः तस्थौ।१०।

गाणगापुरी रोज पाळीपाळीने एक एक ब्राह्मण श्रीगुरूंना शिष्यांसहित भिक्षेला बोलावीत. एकदा तिथे भास्कर नावाचा एक गरीब पण भक्तिमान ब्राह्मण आला.७. श्रीगुरूंवर प्रीती करणारा तो ब्राह्मण त्यांना भिक्षा देण्याच्या इच्छेने तीन माणसांच्या जेवण्यापुरते तांदूळ आदि साहित्य घेऊन त्यांच्याकडे मठांत आला.८. त्या दिवशी कुणी तरी श्रीगुरूंना शिष्य-भक्तांसहित उत्तम पक्वान्नसहित भिक्षा दिली. तो भास्कर ब्राह्मणही त्यांच्याबरोबर तिकडेच जेवायला गेला.९. जेवून संध्याकाळी परतल्यावर तो ब्राह्मण आपण आणलेली भिक्षेची सामुग्री घेऊन मठातच झोपला. अशा रीतीने रोजच श्रीगुरूंच्या पंक्तीला जेवून परत येऊन मठात झोपण्याचा त्याचा क्रम सुरू झाला. पाहता पाहता तीन महिने असेच गेले.१०.

**तं तत्रोपहसन्ति स्म प्राप्य स्वल्पान्नतो गुरुम् । भिक्षां दातुं प्राज्यशिष्यं पुष्णाति स्वमितीतरे ।।११।।**
**तज्ज्ञात्वा तं प्रभुः प्राह भक्तियोगविधित्सया । द्राङ्मे सशिष्यभक्ताय भिक्षां देह्यद्य भाविक ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा हृषितः शाक-सितादुग्धघृतादिकम् । स आनीय स्वयं पाकं कर्तुमारेभ उत्तमम् ।।१३।।**

तत्र तं स्वल्प+अन्नतः प्राज्य+शिष्यं गुरुं भिक्षां दातुं प्राप्य स्वं पुष्णाति' इति इतरे हसन्ति स्म।११। प्रभुः तत् ज्ञात्वा भक्ति+योग+विधित्सया तं प्राह, '(हे) भाविक, अद्य स+शिष्य+भक्ताय मे द्राक् भिक्षां देही'।१२। तत् श्रुत्वा हृषितः सः शाक+सिता+दुग्ध+घृत+आदिकं आनीय स्वयं उत्तमं पाकं कर्तुं आरेभे।१३।

त्याचा हा क्रम पाहून इतर लोक त्याची थट्टा करू लागले, 'हा पहा, मोठा शिष्यपरिवार असलेल्या आपल्या गुरूंना भिक्षा द्यायला म्हणून मोजकी सामुग्री घेऊन आला आहे; पण त्या निमित्ताने आपलेच उदरभरण करतो आहे.'११. त्या लोकांनी केलेला त्याचा उपहास श्रीगुरूंच्या ध्यानात आला. तेव्हा भक्तियोगाचे प्रात्यक्षिक दाखविण्याच्या इच्छेने ते भास्कराला म्हणाले, 'अरे भाविका, आज मला सर्व शिष्य आणि भक्तांसहित लवकर भिक्षा दे.'१२. ते ऐकून भास्कर एकदम आनंदित झाला. त्याने लगेच साखर, दूध, तूप वगैरे पदार्थ आणले उत्साहाने स्वतःच उत्तम स्वयंपाक करायला लागला.१३. त्या वेळी दुसऱ्या एका भक्ताने श्रीगुरूंना भिक्षा देण्याची इच्छा प्रकट केली. त्याला, 'तू उद्या भिक्षा दे' असे सांगून ते भास्कराला म्हणाले, 'सगळ्यांना आमंत्रण कर!' पहिले कुणाचे भिक्षेचे बोलावणे नसताना 'उद्या बोलव' असे सांगणे संन्यासधर्माच्या नियमात बसत नाही. पण इथे श्रीगुरूंसाठी '**अज**' शब्दाची योजना करून ते जन्ममरणादि विकारांच्या पलीकडे असल्याचे सूचित केले आहे. धर्मरक्षणासाठी स्वेच्छेने नरदेह धारण केलेल्या भक्तपराधीन पूर्णकाम श्रीगुरूंनी क्वचित् भक्तवात्सल्याने संन्यासधर्माची मर्यादा उल्लंघन केली तरी त्याचा त्यांना यत्किञ्चितही दोष लागत नाही. ज्ञानी पुरुषांनी विधिनिषेधाचे अतिक्रमण केले तरीही त्यांचे ज्ञान अबाधितच राहते. ब्रह्मज्ञानी पुरुषाचा महिमा नित्य आहे. तो कर्मामुळे वाढत वा घटत नाही असे बृहदारण्यक उपनिषदाचे (४:४:३३) प्रतिपादन आहे. (*एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा न कनीयान्।*). अर्थात् शिष्यांनी मात्र त्यांचे अनुकरण करून चालणार नाही.

**दातुं तदान्यमप्युत्कं भिक्षां देहि श्व इत्यजः । तं निवार्याह्वयाशेषान्भोक्तुमित्याह भास्करम् ।।१४।।**
**तच्छ्रुत्वाप्याह्वयत्तान्स त ऊचुर्लज्जसे न किम् । पक्वान्नकणतुल्यान्नः किमाहूय करिष्यसि ।।१५।।**

तदा अन्यं अपि भिक्षां दातुं उत्कं अजः 'श्वः देहि' इति निवार्य, 'अशेषान् आह्वय' इति भास्करं आह।१४। तत् श्रुत्वा सः तान् आह्वयत्। ते ऊचुः। 'न लज्जसे किम्? पक्व+अन्न+कण+तुल्यात् नः आहूय किं करिष्यसि?'१५।

तैत्तिरीय उपनिषदाच्या आदेशानुसार, 'जे आमचे सुचरित आहे त्याचेच तू अनुकरण कर, इतरांचे नाही.' (*यान्यस्माकं सुचरितव्यानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि।*) केवळ पूर्वीच्या माहात्म्यांनी केले म्हणून त्याचे अनुकरण करणे श्रुतीला मान्य नाही. परशुरामानी मातेचा वध केला; शुनःशेपाने पित्याचा, याज्ञवल्क्याने आचार्यांचा, गौतमाने इंद्ररूप अतिथीचा त्याग केला; बह्मदेवांनी आपल्या कन्येशी संग केला; इंद्राने पुरोहिताचा वध केला; बलरामाने क्षत्रिय असून सुरापान केले, तसेच पुराणिकाचा वध केला; चंद्राने गुरुपत्नीचे अपहरण केले; म्हणून आपणही तसेच वागावे असे नाही तर या महान पुरुषांनी जी प्रसिद्ध, दोषरहित, अनिंद्य, शास्त्रमान्य, लोकमान्य अशी लौकिक व वैदिक कर्तव्ये केली त्यांचे अनुकरण करावे असा वेदवाक्याचा आशय आहे. उदाहरणार्थ, परशुरामाने अत्यंत दुष्कर असूनही पित्याची आज्ञा पाळली; शुनःशेपाने विश्वामित्राच्या उपकाराची जाणीव ठेवली; याज्ञवल्क्याने तपाचरणाने सूर्याला प्रसन्न करून शुक्लयजुर्वेदाचे प्रतिपादन केले; गौतमाने स्वपत्नीशी व्यभिचार करणाऱ्या इंद्राचेही प्राण घेतले नाहीत; ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या उत्पत्तीसाठी प्रचंड श्रम केले; साक्षात् शेष असूनही देवब्राह्मणांच्या कार्यासाठी बलरामाने मानवाचा देह स्वीकारला; त्रैलोक्याच्या स्वास्थ्यासाठी इंद्राने अतिनिंद्य असे ब्रह्महत्येचे पाप अंगीकारले; चंद्राने गुरूंची महान् कीर्ती वाढविली इत्यदि सत्कर्मांचे अनुकरण करावे, असा श्रुतीचा आदेश आहे. श्रीगुरूंनी केलेल्या राजोपचारांचे धारण, पालखीत बसणे इत्यादि अन्य कर्मे सुद्धा त्यांच्या तेजस्वीयतेमुळे निंदनीय नाहीत. मात्र इतरानी त्यांचे अनुकरण केल्यास त्यांचे पतन होणार हे निश्चित!१४. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो ब्राह्मणांना आमंत्रण करू लागला. ते त्याला म्हणाले, 'तुला कांही लाजलज्जा आहे की नाही? तू शिजवलेल्या अन्नांत जेवढे कण आहेत तितकेच आम्ही जेवणारे आहोत. आम्हाला बोलावून काय करणार आहेस?'१५.

**तच्छुत्वैत्य गुरुं तत्स शशंस भगवांस्तदा । आनयित्वात्र भोक्तव्यं सर्वैरित्याह तान्गुरुः ॥१६॥**
**शङ्किता अपि तद्वाक्यात् तूष्णीं स्थित्वा बहूनि ते । निर्माय भुक्तिपात्राणि सर्वे स्नात्वाययुः पुनः ॥१७॥**
**शाट्येशस्याज्ञयाच्छाद्य सिद्धान्नं तीर्थमन्त्रितम् । सहान्यैः षड्विधं सोऽदाद् गुरवे ब्राह्मणैः सह ॥१८॥**
**भक्ताञ्छिष्यान्स तत्रत्यां-स्त्र्यपत्येष्टयुजो द्विजान् । गुरुं चेष्टं सुखं भोक्तुं प्रार्थयामास सादरम् ॥१९॥**
**परमान्नान्नपौल्याज्य-सूपशाकादिषड्रसैः । षोढान्नममितं नीतं त्रिपुंपर्याप्तपाकतः ॥२०॥**

तत् श्रुत्वा सः गुरुं एत्य शशंस। तदा भगवान् गुरुः तान् अत्र आनयित्वा, 'सर्वैः भोक्तव्यम्', इति आह।१६। ते शंकिता अपि तत्+वाक्यात् तूष्णीं स्थित्वा सर्वे बहूनि भुक्ति+पात्राणि निर्माय स्नात्वा पुनः आययुः।१७। सः ईशस्य आज्ञया तीर्थ+मन्त्रितं षड्+विधं सिद्धान्नं शाट्या आच्छाद्य अन्यैः ब्राह्मणैः सह गुरवे अदात्।१८। सः तत्रत्यां‌न् स्त्री+अपत्य+इष्ट+युजाः द्विजान् गुरुं च, इष्टं सुखं भोक्तुं सादरं प्रार्थयामास।१९। त्रि+पुं+पर्याप्त+पाकतः परमान्न+अन्न+आज्य+सूप+ शाकादि षड्रसैः षोढान्नं अमितं नीतम्।२०।

त्यांचे ते बोलणे ऐकून तो बिचारा श्रीगुरूंकडे आला आणि त्याने त्यांना ते सांगितले. तेव्हां श्रीगुरू भगवान् म्हणाले, त्या सर्वांना इकडे आणून त्यांच्याबरोबरच आज जेवायचे आहे. हा श्रीगुरूंचा निरोप ऐकल्यावर त्या ब्राह्मणांनी मनांतला संशय मनांतच ठेवून सगळ्यांनी पत्रावळी केल्या आणि स्नानादिक उरकून मठात आले.१७. मग त्या भास्कर ब्राह्मणाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार केलेल्या सर्व स्वयंपाकावर मंत्रित तीर्थाने प्रोक्षण केले आणि त्यावर श्रीगुरुदेवांची छाटी टाकली. मग इतर कांही ब्राह्मणांच्या मदतीने ते सहा प्रकारचे अन्न श्रीगुरूंना आणि ब्राह्मणांना वाढले. नवव्या अध्यायात भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चार प्रकारचे (चतुर्विध) अन्न सांगितले. त्यांत पापड कुरुड्या इत्यादि चर्व्य आणि दूध, पानक इत्यादि पेय हे दोन प्रकार धरून षड्विध अन्न होते.१८. मग त्या भास्कराने गाणगापूरच्या सर्व ब्राह्मणांना, त्याच्या स्त्रिया, मुले, इष्ट आदिंसहित सर्वांना आणि श्रीगुरूंना आदराने हात जोडून हवे ते सुखाने जेवण्यासाठी प्रार्थना केली.१९. तीन माणसांपुरत्याच केलेल्या त्या स्वयंपाकातून पायस, पोळ्या, तूप, वरण, भाज्या इत्यादि षड्रसपूर्ण (गोड, तिखट, आंबट, खारट, तुरट व कडू) षड्विध अन्न किती नेले त्याची मोजदाद नाही.२०.

**नीत्वा नीत्वापि भोक्तृभ्यो दत्तं तत्र तु पूर्ववत् । नाप्यल्पं दातृभिस्तष्टं चेष्टा भगवतस्त्वियम् ।।२१।।**
**भुक्तं सशेषमाकण्ठं तृप्ताः स्मोऽलमिति द्विजाः । उक्त्वोत्तस्थुः सहाजेन ततो गुर्वाज्ञयाङ्घ्रिजान् ।।२२।।**
**हीनांश्चाहूय तेभ्योऽदात्कामं नान्नं व्यहीयत । पशुपक्षिमृगादिभ्यः प्रकामं स उपानयत् ।।२३।।**
**न शिष्टास्तत्र केपीति श्रुत्वा भुक्त्वा तदाज्ञया । यादोभ्योऽदात्स शेषान्नं तदा निःशेषतां ययौ ।।२४।।**
**माधुर्यं सुरसान्नस्य दुर्लभं ह्यमृतान्धसाम् । स्वप्नेऽपि न श्रुतं रुच्यं तृप्तिरेषाप्यलौकिकी ।।२५।।**

नीत्वा नीत्वा भोक्तृभ्यः दत्तं तत्र तु पूर्ववत्। न अल्पं न अपि दातृभिः तष्टम्। इयं तु भगवतः चेष्टा।२१। द्विजाः सशेषं 'आकण्ठं भुक्तं', 'तृप्ताः स्मः', 'अलं' इति उक्त्वा अजेन सह उत्तस्थुः। तदा सः गुरु+आज्ञया हीनां च आहूय तेभ्यो कामं (अन्नं) अदात्, अन्नं न व्यहीयत्। सः पशु+पक्षि+मृग+आदिभ्यः प्रकामं उपानयत्।२२-२३। 'के अपि न शिष्टा' इति श्रुत्वा तत्+आज्ञया भुक्त्वा सः शेष अन्नं यादोभ्यः अदात्। तदा निःशेषतां ययौ।२४। सुरस+अन्नस्य माधुर्यं अमृत+अन्धसां हि दुर्लभम्। स्वप्ने अपि न श्रुतं रुच्यम्। एषा तृप्तिः अपि अलौकिकी।२५।

भरभरून नेऊन जेवणाऱ्यांना वाढले तरी ते छाटीखालचे अन्न जसेच्या तसेच राहिले. न त्यात कांही घट झाली, न वाढणाऱ्यांनाही कमी पडले! ही अष्टैश्वर्यसंपन्न भगवंताचीच लीला होय.२१. सगळे ब्राह्मण 'पुरे, पुरे', 'आम्ही तृप्त झालो', 'गळ्यापाशी अन्न आले', असे म्हणत श्रीगुरूंच्या सह उठले. मग श्रीगुरूंच्या आज्ञेने भास्कराने शूद्रादिकांना बोलावून त्यांना यथेच्छ अन्न वाढून दिले. तरीही ते कमी झाले नाही असे पाहून पशुपक्ष्यांनाही भरपूर घातले.२२-२३. शेवटी गावात कुणीही जेवायचे राहिले नाही याची खातरजमा करून तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने जेवला. नंतर उरलेले अन्न त्याने नदीत जलचरांना घातले तेव्हा कुठे ते अन्न संपले.२४. तिथे जेवलेले लोक म्हणू लागले, या रसभरित अन्नाची गोडी खरोखर देवदुर्लभ आहे. स्वप्नातही इतके रुचकर अन्न खायला काय ऐकायलाही मिळाले नाही. या अन्नाने आलेली ही तृप्तीसुद्धा अलौकिक आहे.२५.

**प्राक्पार्थसङ्कटेऽरण्ये निशीथेऽदात्स्वमायया । ऋषिभ्योऽन्नं हरिरिति श्रुतं दृष्टं त्वदोऽत्र तु ।।२६।।**

'प्राक् हरिः पार्थ+सङ्कटे अरण्ये निशीथे स्व+मायया ऋषिभ्यः अन्नं अदात् इति श्रुतम्। अत्र तु दृष्टम्।२६।

'पूर्वी पांडवांवरील संकटाचे निवारण करण्यासाठी श्रीकृष्णांनी अरण्यांत आपल्या मायेच्या प्रभावाने ऋषींना अन्न दिले असे ऐकले होते. पण आज मात्र प्रत्यक्ष पाहण्यात आले.' ही महाभारतातील कथा थोडक्यात अशी. एकदा दुर्योधनाने दुर्वास ऋषींचे आतिथ्य करून त्यांना प्रसन्न करून घेतले. त्यात त्याचा हेतू असा होता की द्यूतांत राज्य गमावून वनवासात असलेल्या पांडवांचा दुर्वास ऋषींच्या शापाने नाश व्हावा. म्हणून दुर्योधनाने त्यांना असा वर मागितला की, 'आमच्या कुळांत युधिष्ठिर ज्येष्ठ आहे. त्याचेही आतिथ्य आपण स्वीकारावे. मात्र आमच्या द्रौपदीवहिनी उपाशी असतांना आपण जाऊ नये. त्यांचे जेवण झाले की मग जावे.' दुर्वास मुनी पांडवांच्या घरी रात्रीच्या वेळी गेले. युधिष्ठिराने परमादराने त्यांचे स्वागत केले आणि आह्निक उरकून जेवायला येण्याची विनंती केली. आपल्या शिष्यसंघाबरोबर मुनी नदीवर स्नानादिकांसाठी गेले. द्रोपदीला सूर्याने दिलेल्या थाळीतून अक्षय अन्न मिळत असे. मात्र तिचे जेवण झाल्यानंतर ते बंद होत असे. तेव्हा आता या सर्व ऋषींच्या भोजनाची काय व्यवस्था करावी अशा चिंतेत द्रौपदी पडली. तेव्हा तिने भगवान श्रीकृष्णांचे स्मरण केले. आठवण केल्याबरोबर भक्तवत्सल श्रीकृष्ण तात्काळ तिच्यासमोर उपस्थित झाले. द्रौपदीने सांगितलेला वृत्तांत ऐकून भगवान म्हणाले, 'त्या ऋषींच्या जेवणाचे आपण पाहू काय करायचे ते. आधी मला भूक लागली आहे! कांही तरी खायला दे.' द्रौपदीला खूप लाज वाटली. ती म्हणाली, 'अरे कृष्णा, सर्वांची जेवणे झाल्यावर मी जेवते. माझे जेवण होईपर्यंत थाळीतील अन्न अक्षय असते. पण माझे जेवण झाल्यावर मात्र थाळीत कांहीच अन्न उरत नाही.' तेव्हा द्रौपदीला खूप आग्रहाने श्रीकृष्णांनी ती थाळी आणायला लावली. त्या वेळी त्या थाळीच्या काठाशी किंचितशी भाजी लागलेली होती. ती बोटाने चाटून श्रीकृष्णाने, 'या अन्नाने विश्वात्मा भगवान प्रसन्न होवो, (*अनेन विश्वात्मा भगवान प्रीयताम्।*)' असे म्हटले. मग त्यांनी द्रौपदीला सर्व मुनींना जेवायला बोलवायला सांगितले. तेव्हा ते सगळेच अत्यंत तृप्त झाले होते.२६.

**नृणां चतुःसहस्राणि भुक्तानि स्वल्पपाकतः । जीवा अगणिता भुक्ता मायाऽतर्क्येयमीशितुः ।।२७।।**
**भास्करोऽयं प्रियो भक्तो यत्प्रसादोऽस्य नान्यके । त्रिमासं सर्वदा तेन पादसंवाहनादिभिः ।।२८।।**
**श्रद्धाभक्त्यैव भगवान् सेवितस्तत्फलं त्विदम् । इत्युक्त्वान्ये नराः प्रेम्णा तुष्टुवुः श्रीगुरुं परम् ।।२९।।**

स्वल्प+पाकतः नृणां चतुः सहस्राणि भुक्तानि, जीवाः अगणिताः भुक्ताः। इयं ईशितुः माया अतर्क्या।२७। अयं भास्करः प्रियः भक्तः यत् अस्य प्रसादः न अन्यके। तेन त्रिमासं सर्वदा पाद+संवाहनादिभिः श्रद्धा+भक्त्या एव भगवान् सेवितः इदं तत्+फलम्।' अति उक्त्वा अन्ये नराः परं श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टुवुः।२८-२९।

थोड्याशाच स्वयंपाकात चार हजार माणसे आणि अगणित जीव जेवून तृप्त झाले, ही ईश्वराची माया खरेच अतर्क्य आहे. 'अणूपेक्षांही सूक्ष्म असलेला हा परमात्मा अतर्क्य आहे,' ह्या कठोपनिषदाच्या (१:२:८) प्रतिपादनाची साक्ष इथे पटते.२७. ते लोक पुढे एकमेकांना म्हणू लागले, हा भास्कर श्रीगुरूंचा प्रिय भक्त आहे; कारण याच्यासारखा कृपाप्रसाद दुसऱ्या कुणालाही मिळाला नाही. त्याने तीन महिने श्रद्धेने आणि भक्तीने श्रीगुरुभगवंतांची पाय दाबणे इत्यादि सेवा केली त्याचेच हे फळ होय. असे बोलून दुसरे लोक प्रेमभराने श्रेष्ठ अशा श्रीगुरूंची स्तुती करू लागले.२८-२९.

श्रीगुरूंनी भास्कराला ईप्सित वर देऊन त्याच्या घरी बोळविले. पुढे तो गुरुप्रसादाने सर्व ऐहिक भोगांचा भोग घेऊन अन्ती सायुज्य मुक्ती पावला. अंत म्हणजे देहांत असा अर्थ घ्यावा किंवा सत्य आणि असत्य, द्वैत आणि अद्वैत यांची सरमिसळ भासवणाऱ्या संसाररूपी भ्रमाचा अंत असा घ्यावा. सायुज्य मुक्ती म्हणजे आत्यंतिक मोक्ष. अर्थात् निर्गुण साक्षात्कार.

**दत्वा प्रभुर्भास्करमीप्सितं वरं प्रस्थापयामास गृहाय स द्विजः ।**
**ईशप्रसादात्सकलार्थयुग्ययौ सायुज्यमन्ते दृढभक्तियोगतः ।।३०।।**

प्रभुः भास्करं ईप्सित+वरं दत्वा गृहाय प्रस्थापयामास। सः द्विजः ईश+प्रसादात् सकल+अर्थ+युक् अन्ते दृढ+भक्तितः सायुज्यं ययौ।३०।

इथे अशी शंका येऊ शकते की, श्रीगुरू हे साक्षात् ईश्वराचेच अवतार असले तरी ते साकार असल्याने सगुणच आहेत. मग सगुणाच्या उपासनेने निर्गुण साक्षात्काररूपी आत्यंतिक मोक्ष कसा होईल? याविषयी अमलानंद कल्पतरूंत लिहितात - *निर्विशेषं परं ब्रह्म साक्षात्कर्तुमनीश्वराः। ये मन्दास्तेऽनुकम्प्यन्ते सविशेषनिरूपणैः।। वशीकृते मनस्तेषां सगुणब्रह्मशीलनात्। तदेवाविर्भवेत्साक्षादपेतोपाधिकल्पनम्।।* निर्गुण परब्रह्माचा साक्षात्कार करण्याला असमर्थ अशा मंदबुद्धीच्या साधकांवर दया करून श्रुतिमाउलीने सगुण ब्रह्माचे निरूपण केले आहे. सगुणब्रह्माच्या परिशीलनाने त्यांनी मनाला वश केल्यावर सहजच उपाधिरहित (निर्गुण) ब्रह्म प्रकट होते. ब्रह्म शब्द 'बृह' धातूपासून झाला आहे. वृद्ध (विस्तृत) वस्तू असा त्याचा अर्थ आहे. ही वृद्धी निरतिशय (unqualified) आहे. कारण त्याला कुठलेच संकोचक (limiting) उपपद वाचक वगैरे लावलेले नाही. '*अथातो ब्रह्मजिज्ञासा*' या सूत्राच्या भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे निरतिशय वृद्ध (वाढलेला, वाढणारा) या बृह धातूच्या अर्थांतूनच नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान हे अर्थ प्रतीत होतात. तेच ब्रह्म श्रीगुरू नृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांच्या रूपाने अवतलेले आहे हे आपण आठव्या अध्यायात पाहिलेच आहे. सायुज्य म्हणजेच आत्यंतिक मोक्ष हा केवळ भगवत्प्रसादानेच लाभतो हे पुनःपुनः सांगितले आहे.३०.

**शृण्वन्यदप्यद्भुतमीशचेष्टितं गङ्गाह्वया तत्र तु षष्टिवत्सरा ।**
**साध्वी वशानर्च परमेशमन्वहं भक्त्यैकदोचे स तु तां किमिच्छसि ।।३१।।**

**।। गङ्गोवाच ।।**

**लोकोऽपुत्रस्य न स्वःस्था लुप्तपिण्डोदकक्रियाः । पितरोऽधः पतन्तीति श्रुत्वा स्वामिन् बिभेम्यहम् ।।३२।।**
**भवेऽग्रे सुपुत्राप्त्या गतिर्भूयादितीच्छया । सर्वेश तेऽर्चनं कुर्वे पाहि मां करुणानिधे ।।३३।।**

अन्यत् अद्भुतं ईश+चेष्टितं शृणु। तत्र तु गङ्गा+आह्वया षष्टि+वत्सरा वशा साध्वी अनु+अहं भक्त्या परम+ईशं आनर्च। एकदा सः तु तां ऊचे, 'किं इच्छसि?'३१। गङ्गा उवाच। 'अपुत्रस्य लोकः न। (हे) स्वामिन्, स्वः+स्थाः पितरः लुप्त+पिंड+उदक+क्रियाः अधः पतन्ति इति श्रुत्वा अहं बिभेमि।३२। (हे) सर्वेश, (हे) करुणा+निधे, अग्रे भवे सु+पुत्र+आप्त्या गतिः भवेत् इति इच्छया ते अर्चनं कुर्वे।३३।

साक्षात् ईश्वरस्वरूप सद्गुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक! तिथे गाणगापुरात एक गंगा नावाची साठ वर्षांची वंध्या सती रोज न चुकता येऊन अत्यंत भक्तीपूर्वक श्रीगुरू परमेश्वरांची पूजा करीत असे. एकदा त्यानी तिला विचारले, 'तुझी काय इच्छा आहे?'३१. गंगा उत्तरली, 'ऐतरेय ब्राह्मणांत (७:३:१) अपुत्राला (पर)लोक लाभत नाही असे म्हटले आहे. स्वर्गातही गेलेल्या पितरांचा, श्राद्ध आणि तर्पणाचा लोप झाल्याने अधःपात होतो असे वेदवचन ऐकून मला भीती वाटते.'३२. 'हे सर्वेश्वरा, दयासागरा, ह्या जन्मात नाही तरी निदान पुढच्या जन्मात सुपुत्राचा लाभ होऊन सद्गती मिळावी ह्याच इच्छेने मी आपले पूजन करते.'३३.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**कमावर्तेन मायाब्धौ क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम् । क्वेयं तत्र स्मृतिस्तेऽत्र पुत्रौ गङ्गे भविष्यतः ॥३४॥**
**तच्छ्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वोचे पुत्रवत्यहो । निष्कला जातिवन्ध्यापि भवेयं त्वत्प्रसादतः ॥३५॥**
**व्रततीर्थार्चने यातं वयो मे पुत्रकामया । विशेषात्सेवितोऽश्वत्थो मौर्ख्याद्दास्यति किं स मे ॥३६॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**ब्रह्मनारदसंवादं शृण्वात्थ यदसत्तु तत् । नारदाश्वत्थमूलेऽहं मध्येऽजोऽग्रे शिवः पुनः ॥३७॥**

श्रीगुरुः उवाच। 'माया+अब्धौ कर्म+आवर्तनेन क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम्? ते तत्र इयं स्मृतिः क्व? गङ्गे अत्र पुत्रौ भविष्यतः।'३४। तत् श्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वा (सा) ऊचे। अहो निष्कला जाति+वन्ध्या अपि त्वत्+प्रसादात् पुत्रवती भवेयम्।३५। 'मे पुत्र+कामया वयः व्रत+तीर्थ+अर्चने यातम्। विशेषतः मौर्ख्यात् अश्वत्थः सेवितः। स मे किं दास्यति?'३६। श्रीगुरुः उवाच। 'यत् आत्थ तत् असत्। ब्रह्म+नारद+संवादं शृणु।' '(हे) नारद, अश्वत्थ+मूले अहं, मध्ये अजः अग्रे शिवः।३७।

श्रीगुरू तिला म्हणाले, 'या मायेच्या सागरांतील कर्माच्या चक्रात तू कुठे कुठे फिरणार आहेस हे तू जाणतेस काय? त्या जन्मात जरी तुला पुत्रप्राप्ती झाली तरी ती माझीच कृपा आहे ही आठवण तुला राहील का? ऐक गंगे, याच जन्मात तुला दोन (एक कन्या आणि एक) पुत्र होतील.'३४. ते ऐकून गंगेने पदराला गाठ मारली आणि म्हणाली, 'मी जन्मतःच वंध्या आहे आणि आतां तर मला ऋतूही येत नाही. तरी आपल्या प्रसादाने मी पुत्रवती होईन असा विश्वास वाटतो.'३५.

**अवाक्प्रत्यगुदक्शाखास् त्रयाणां प्राक्समाः सुराः । तीर्थाब्धयश्चाङ्कुरेषु गोयज्ञर्षिश्रुतिद्विजाः ।।३८।।**
**ॐकारोऽङ्घ्रन्तशीर्षस्थ इत्यश्वत्थोऽस्त्यसंस्कृतः ।**
**नार्च्यः संस्कृत्य मौञ्ज्युक्त-कालेऽस्मिन्सत्क्षणेऽर्चयेत् ।।३९।।**

पुनः त्रयाणां अवाक्, प्रत्यक्, उदक् शाखाः। प्राक् समाः सुराः। अङ्कुरेषु तीर्थ+अब्धयः च गो+यज्ञ+ऋषि+श्रुति+द्विजाः।३८। ॐकारः अङ्घ्रि+ अन्त+शीर्ष+स्थः। इति अश्वत्थः अस्ति। असंस्कृतः न अर्च्यः। अस्मिन् मौञ्जी+उक्त+काले संस्कृत्य सत्+क्षणे अर्चयेत्।३९।

'मी पुत्रप्राप्तीच्या इच्छेने व्रत, तीर्थे आणि पूजा करण्यात सगळे आयुष्य घालविले. विशेषतः अश्वत्थाची (पिंपळाची) पूजा-प्रदक्षिणादि सेवा केली. तो पिंपळ मला अभागिनीला काय पुत्र देणार?'३६. श्रीगुरू तिला म्हणाले, 'अश्वत्थाला तू बोल लावतेस तो खरा नाही. '*अश्वत्थः सर्ववृक्षाणां*' असे भगवंत गीतेत (१०:२६) सांगतात. अश्वत्थाचे (पिपंळाचे) माहात्म्य विशद करणारा नारद आणि ब्रह्मदेव यांचा संवाद तू ऐक. 'नारदाने प्रश्न केल्यावर ब्रह्मदेवांनी त्याला सांगितले, 'नारदा, अश्वत्थाच्या मुळाशी मी स्वतः, मध्ये विष्णू आणि शेंड्यावर शंकर वास करतो.३७. तसेच त्याच्या दक्षिण, पश्चिम आणि उत्तर शाखांवरही त्याच क्रमाने आम्ही वसतो. पूर्व शाखेवर सर्व देवता राहतात. आणि त्याच्या पालवीत सर्व तीर्थे, सागर, गोमाता, यज्ञ, ऋषी, वेद आणि ब्राह्मण वसतात.३८. ॐकाराच्या अ, उ आणि म या मात्रा त्याच्या मूळ, मध्य आणि टोकाशी, ऋक्, यजुः, साम या वेदांसहित तसेच भूः, भुवः, स्वः या लोकांसहित वास करतात. असा हा अश्वत्थ वृक्ष आहे. अश्वत्थाचे पूजन त्याची मुंज केल्याशिवाय करू नये. विहित काळी त्याची मुंज केल्यावर चांगला मुहूर्त पाहून पूजा करावी.'३९.

**नार्कारशुक्रनिट्सन्ध्या-कुयुक्पर्वादिषु स्पृशेत् । वर्णित्वमौनसत्त्वाढ्यो भजेन्नामुं वधूरपि ।।४०।।**
**तत्तले गोविशा लिप्ते रञ्जिते स्वस्ति वाचयेत् । संस्नाप्य सप्तकलशैः पूजयेत्स्वाधिकारतः ।।४१।।**
**ध्यात्वाष्टबाहुं श्रीविष्णु-रूपमावेष्ट्य वाससा । नाममन्त्रैर्मंदगत्या शक्त्या कार्याः प्रदक्षिणाः ।।४२।।**
**नमेत्प्रदक्षिणायास्तु भक्त्याद्यन्तसमाप्तिषु । पदे पदे मेधफलं दैन्यर्णार्त्यघतापहृत् ।।४३।।**
**ग्रहार्तिघ्नं सौरिवारे तन्नामोच्चारणं तरोः । सदेशेऽपैति नुः काल-मृत्यू रौद्रमनोर्जपात् ।।४४।।**

अर्क, आर, शुक्र, निट्, सन्ध्या, कुयुक्+पर्व आदिषु न स्पृशेत्। वर्णित्व+मौन+सत्त्व+आढ्यो अमुं ना, वधूः अपि भजेत्।४०। तत् तले गो+विशा लिप्ते स्वस्ति वाचयेत्। सप्त+कलशैः संस्नाप्य स्व+अधिकारतः पूजयेत्।।४१।। अष्ट+बाहुं श्रीविष्णु+रूपं ध्यात्वा वाससा आवेष्ट्य मन्द+गत्या शक्त्या प्रदक्षिणाः कार्या।४२। प्रदक्षिणायाः आदि+अन्त+समाप्तिषु भक्त्या नमेत्। पदे पदे मेध+फलं दैन्य+ऋण+आर्ति+अघ+ताप+हृत्।४३। सौरि+वारे तत्+नाम+उच्चारणं ग्रह+आर्ति+घ्नम्। तरोः सदेशे रौद्र+मनोः जपात् नुः काल+मृत्यू अपैति।४४।

रविवार, मंगळवार, शुक्रवार, रात्री, सायंकाळी अशुभ योगी वा पर्वकाळी अश्वत्थाला स्पर्श करू नये. ब्रह्मचर्य, मौन, सत्यवचन आदि नियम पाळून ह्याला पुरुषाने आणि स्त्रीनेही पुजावे.४०. अश्वत्थाच्या खाली गोमयाने सारवावे. प्रथम स्वस्तिवाचन करावे; मग सात कलशांनी त्याला स्नान घालावे आणि आपल्या स्त्री, पुरुष, वर्ण आदि अधिकारानुसार पूजा करावी.४१. श्रीविष्णूंच्या अष्टभुज रूपाचे ध्यान करावे. अश्वत्थाला वस्त्राने वेढावे. मग विष्णुसहस्रनामातील प्रत्येक नामाच्या चतुर्थ्यंत रूपाने जप करीत हळूहळू शक्त्यनुसार प्रदक्षिणा कराव्यात.४२. प्रदक्षिणेच्या सुरुवातीला, मध्यभागी आणि शेवटी भक्तीपूर्वक नमस्कार करावा. प्रदक्षिणेच्या पावलागणिक अश्वमेधाचे फळ मिळते. नामोच्चारणाने दैन्य, ऋण, पीडा, पाप आणि (आध्यात्मिकादि) ताप दूर होतात.४३. शनिवारी पिंपळाची प्रदक्षिणा करीत शनीच्या नावाचा उच्चार केल्याने ग्रहांची बाधा दूर होते. (‘*कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोऽन्तको यमः। सौरिः शनैश्चरो मन्दो पिप्पलादेन संस्तुतः।।*’ शनैश्चरस्तोत्र १४)४४.

**तत्रातिफलदा ब्रह्म-भुज्याप्लुतिजपाध्वराः । पुत्रादिकामसिद्ध्यै नो विलम्बोऽक्षय्यपुण्यदात् ।।४५।।**
**येनेह स्थापितोऽश्वत्थस्तेन स्वः स्थापितं कुलम् । येन च्छिन्नोऽपि वंशः स्वस्तेन च्छिन्नो न संशयः ।।४६।।**
**प्रदक्षिणादशांशेन हवनं तद्दशांशतः । कृत्वा ब्रह्मभुजिं दद्याद्धैमाश्वत्थार्थगोतिलान् ।।४७।।**
**सद्ब्रह्मभ्यो लभेदिष्टमित्यूचे नारदं विधिः । तस्मात्तं विधिना साध्वी भज द्राक्सिद्धिदोऽस्ति सः ।।४८।।**

तत्र ब्रह्म+भुजि+आप्लुति+अध्वराः अति+फलदाः। अक्षय्य+पुण्य+दात् पुत्र+आदि+काम+सिद्ध्यै नो विलम्बः।४५। येन इह अश्वत्थः स्थापितः तेन स्वः कुलं स्थापितम्। येन छिन्नः तेन अपि स्वः वंशः छिन्नः न संशयः।४६। प्रदक्षिणा+दश+अंशेन हवनं, तत् दशांशतः ब्रह्म+भुजिं कृत्वा हैम+अश्वत्थ+अर्थ+गो+तिलान् सत्+ब्रह्मेभ्यः दद्यात्। इष्टं लभेत। इति विधिः नारदं ऊचे। तस्मात् (हे) साध्वी, तं विधिना भज। सः द्राक् सिद्धिदः अस्ति।४७-४८।

अश्वत्थाच्या जवळ मृत्युंजय ('*त्र्यंबकं यजामहे*') मंत्राचा जप केला असता कालमृत्यूही टाळता येतो. मग अपमृत्यूची काय कथा? अश्वत्थाखाली ब्राह्मणभोजन, स्नान, जप, यज्ञ हे केले असता अधिक फळ मिळते. अक्षय्य पुण्य देणाऱ्या अश्वत्थाच्या सेवेने पुत्रादि इच्छांची पूर्ती होण्यास विलंब लागत नाही.४५.

ज्याने या भूलोकांत पिंपळ लावला त्याने आपला वंशच स्थिर केला; आणि ज्याने पिंपळाचे झाड तोडले त्याने जणू आपलाच वंशच्छेद केला.४६. व्रताच्या सांगतेसाठी उद्यापन सांगितले आहे. प्रदक्षिणेच्या दशांश हवन आणि त्याच्या दशांश ब्राह्मणभोजन करून सोन्याचा पिंपळ, गाय दक्षिणा आणि तीळ यांचे सात्त्विक आणि विद्वान् ब्राह्मणाला दान करावे. असे ब्रह्मदेवाने नारदांना सांगितले. असा संवादाचा समारोप करून श्रीगुरू गंगेला म्हणतात, 'याकरिता हे सती, त्या पिंपळाची तूं पूजा कर. तो शीघ्र सिद्धिदायक आहे.'४७-४८.

**त्वं भीमामरजायोगे स्नात्वा षट्कूल उत्तमम् । संगमस्थं भजाश्वत्थं सत्यं पुत्रौ भविष्यतः ।।४९।।**
**तथा कुर्वेऽपि षष्ट्यब्दा मत्वोक्तिं तव वेदवत् । इत्युक्त्वा सेश्वराश्वत्थं पत्या भेजे यथाविधि ।।५०।।**

'त्वं भीमा+अमरजा+योगे षट्कूले स्नात्वा सङ्गमस्थं उत्तमं अश्वत्थं भज। सत्यं पुत्रौ भविष्यति।'४९। 'तव उक्तिं वेदवत् मत्वा षष्टि+अब्दा अपि तथा कुर्वे,' इति उक्त्वा स+ईश्वर+अश्वत्थं पत्या यथाविधि भेजे।५०।

**सकाम उपासना -** इथे हे लक्षात घ्यायचे आहे की सकाम उपासना ही प्रत्यक्षतः मोक्षाला उपयुक्त नाही. तरी पण कामाने ज्यांची मने कलुषित आहेत त्यांना इच्छापूर्तीसाठी का होईना ईश्वराचे भजन घडते आणि अंतर्मुखता येऊन ईश्वरभजनाची गोडी लागते. ईश्वरभजनाच्या प्रभावाने कामबीजाचे भस्म होते. हा वस्तुशक्तीचा प्रभाव आहे. वासनेचे बीज जळून गेल्यावर ईश्वरभक्तीद्वारा अधिकार प्राप्त होतो आणि भगवंताचा कृपाप्रसाद होतो. क्षुद्रदेवतांच्या आराधनाने मिळालेल्या फळासारखे हे फळ नाशिवंत नसते. देवतामय अश्वत्थाच्या भजनाच्या उपदेशातून आणि त्याला ॐकाररूप दाखवून इथे असाही आदेश मिळतो की संसारवृक्षाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवावी. प्रपंचातही परमार्थ पाहावा असा भावार्थ.

पुढे तिला श्रीगुरूंनी सांगितले की, 'तू भीमा आणि अमरजा यांच्या संगमाच्या षट्कूलात स्नान करून संगमावरील उत्तम अशा पिंपळाची सेवा कर. खरोखर तुला एक कन्या आणि एक पुत्र होतील.' अन्नमय कोशाची ब्रह्मदृष्टीने उपासना केल्यास सर्व अन्नाची प्राप्ती होते तसेच हे फळ सांगितले आहे. आपल्या भावानुसार सिद्धी होते असा अभिप्राय.४९ 'आपले वचन वेदतुल्य मानून मी अश्वत्थाला देवतास्वरूप मानून त्याची सेवा करते' असे श्रीगुरूंना बोलून तिने आपल्या पतीसह त्या पिंपळाची आणि त्याखाली बसलेल्या सद्गुरूंची यथाविधी पूजा केली.५०.

**चतुर्थेऽह्न्याह तत्स्वप्ने कृत्वाश्वत्थप्रदक्षिणाः । यद्दास्यति गुरुर्भुङ्क्ष्व भवेत्पुत्र इति द्विजः ।।५१।।**
**साप्युत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य सद्गुरुम् । भक्त्या प्रदक्षिणीकृत्य साश्वत्थं प्रणनाम ह ।।५२।।**
**दत्त्वा फले स तां प्राह दानं देहि समाप्य सत् । व्रतं प्रदक्षिणारूपं फले भुंक्ष्वेष्टकामदे ।।५३।।**
**प्राग्युगेऽनेकपुत्राः स्युरौरसो दत्तकस्त्विह । औरसस्तूत्तमोऽस्यास्य-दर्शनं पितृमुक्तिदम् ।।५४।।**
**तत्साध्वीहौरसौ पुत्रौ तारकौ ते भविष्यतः । मदर्चनफलं त्वेतन्न सन्देहोऽत्र शोभने ।।५५।।**

अश्वत्थ+प्रदक्षिणाः कृत्वा चर्तुथे अह्नि तस्य स्वप्ने द्विजः 'यत् गुरुः दास्यति भुङ्क्ष्व' इति।५१। सा अपि उत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य, सद्गुरुं स+अश्वत्थं भक्त्या प्रदक्षिणीकृत्य प्रणनाम ह।५२। सः तां फले दत्वा प्राह। प्रदक्षिणा+रूपं सत् व्रतं समाप्य इष्ट+कामदे फले भुङ्क्ष्व।५३। 'प्राक् युगे अनेक पुत्राः स्युः, इह तु औरसः दत्तकः (च)। औरसः तु उत्तम+उत्तमः, अस्य दर्शनं पितृ+मुक्तिदम्।५४। तत् (हे) साध्वि, इह ते औरसौ तारकौ पुत्रौ भविष्यतः। (हे) शोभने, एतत् तु मत्+अर्चन+फलं अत्र न संदेहः।५५।'

तिने आरंभिलेल्या अश्वत्थसेवेच्या चौथ्या दिवशी तिच्या स्वप्नात एका ब्राह्मणाने येऊन सांगितले की, 'पिंपळाला प्रदक्षिणा घातल्यावर तुला श्रीगुरू जे देतील ते भक्षण कर.'५१. तिने सकाळी उठून स्नान केले आणि संगमावर जाऊन पिंपळासहित सद्गुरूंना भक्तीपूर्वक प्रदक्षिणा करून नमस्कार केला.५२. त्यांनी तिला दोन फळे देऊन सांगितले की, 'तुझ्या प्रदक्षिणात्मक व्रताची दान करून समाप्ती कर आणि ही फळे खा.'५३. गरुडपुराणांत 'किती प्रकारचे पुत्र असतात?' या गरुडाच्या प्रश्नाला उत्तर देताना भगवान् विष्णूंनी चौदा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत. मात्र कलियुगांत औरस आणि दत्तक हे दोनच पुत्र शास्त्रसंमत आहेत. (*औरसो दत्तकश्चैव कलौ द्वावेव संमतौ। औरसो धर्मपत्नीज..*) जिवंतपणी औरस पुत्राचे मुखदर्शन पित्याचे ऋण फेडून त्याला मुक्ती देणारे असते असे ऐतरेय ब्राह्मणाचे (७:३:१) वचन आहे. तरी हे साध्वी, तुला या जन्मीच दोन तारक औरस पुत्र (एक कन्या आणि एक पुत्र) होतील. हे शोभने, हे तू केलेल्या माझ्या अर्चनाचेच फळ आहे यांत संशय नाही.'५४-५५.

**तथेत्युक्त्वापि सा गेहं गत्वा चक्रे यथोदितम् । निष्कलाप्यृतुमत्यासीन् निःसीममहिमा प्रभोः ।।५६।।**
**शुद्धूर्ध्वं सह पत्यैत्य सा प्रपूज्य गुरुं मुदा । गृहं गत्वा दधौ गर्भं तन्निशीशप्रसादतः ।।५७।।**
**स्वतन्त्रसंविद्भगवान् लीलां को वेत्ति यत्स्तुतौ । द्विसहस्ररसज्ञोऽपि कुण्ठितश्चकिता श्रुतिः ।।५८।।**
**वलीपलितवेपैर्यद्देहो विद्धो जराकृशः । साधत्त गर्भमित्यन्ये प्रशशंसुः परस्परम् ।।५९।।**
**तद्भर्ता सोमनाथस्तु प्रीत्या पुंसवनादिकाः । क्रिया व्यधात्क्रमात्पुत्रीं कालेऽसौषीत्ततः सती ।।६०।।**

सा अपि 'तथा' इति उक्त्वा गेहं गत्वा यथा उदितं चक्रे । (सा) निष्कला अपि ऋतुमति आसीन्। प्रभोः निःसीममहिमा।५६। सा शुद्धि+ऊर्ध्वं पत्या सह एत्य मुदा गुरुं प्रपूज्य गृहं गत्वा तत् निशि ईश+प्रसादात् गर्भं दधौ।५७। यत् स्तुतौ द्वि+सहस्र+रसज्ञः अपि कुण्ठितः, श्रुतिः चकितः, स्वतन्त्र+संवित् भगवान् (तस्य) लीलां कः वेत्ति?५८। अन्ये परस्परं प्रशशंसुः, 'यत् देहः वली+पलित+वेपैः विद्धः जरा+कृशः सा गर्भं आधत्त।'५९। तत् भर्ता सोमनाथः तु प्रीत्या क्रमात् पुंसवनादिकाः क्रिया व्यधात्। ततः काले सती पुत्रीं असौषीत्।६०।

श्रीगुरूंची आज्ञा मान्य करून ती घरी गेली आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे तिने ती फळे खाल्ली. श्रीगुरूंच्या अपार महिमेने ती गतार्तवा वृद्धाही ऋतुस्नात झाली.५६. चौथ्या दिवशी स्नान करून शुद्ध झाल्यावर ('*चतुर्थेऽह्नि शुद्ध्यति.*' पराशरस्मृति ७:१७) पाचव्या दिवशी ती पतीसह श्रीगुरूंकडे येऊन आनंदाने त्यांची पूजा करून घरी गेली. भगवंताच्या कृपाप्रसादाने त्याच रात्री तिला गर्भधारणा झाली.५७. ज्याची स्तुती करता करता शेषाला दोन हजार जिभाही पुरल्या नाहीत आणि वेदही चक्रावून गेले त्या अपराधीनबुद्धी भगवंताच्या लीला कुणाला तरी कळतील का?५८. सर्व लोक आश्चर्याने परस्परांना म्हणू लागले, 'जिचा देहावर वळ्या पडलेल्या आहेत, केस पांढरे झाले, अंगाला कांप आहे, वार्धक्याने देह कृश झालेला आहे, अशा म्हातारीला गर्भ राहिला!'५९. तेव्हा गंगेच्या पतीने, सोमनाथाने हौसेने क्रमशः पुंसवनादि शास्त्रविहित गर्भाचे संस्कार केले. मग त्या सतीने यथाकाल एका मुलीला जन्म दिला.६०.

**तदेयं कन्यका साध्वी सच्छीलगुणशालिनी । भविष्यति कुलोद्धर्त्री पुत्राढ्येत्याह दैववित् ।।६१।।**
**तच्छ्रुत्वा स द्विजेभ्योऽदादर्थवस्त्रादिकं द्विजः । प्रापतुर्द्वादशेऽह्नीशं कन्यामादाय दंपति ।।६२।।**
**तत्पादाब्जान्तिकं कन्यां संस्थाप्योचे प्रणम्य सा । संसृतिस्थजरद्वन्ध्य-द्रुमस्ते फलितो दृशा ।।६३।।**

तदा दैववित् 'इयं कन्यका साध्वी, सत्+शील+गुण+शालिनी कुल+उद्धर्त्री पुत्र+आढ्या भविष्यति' इति आह।६१। तत् श्रुत्वा सः द्विजः द्विजेभ्यो अर्थ+वस्त्र+आदिकं अदात्। द्वादशे अह्नि दंपति कन्यां आदाय ईशं प्रापतुः।६२। तत्+पाद+अब्ज+अन्तिकं कन्यां संस्थाप्य प्रणम्य सा ऊचे। 'ते दृशा संसृति+स्थ+जरत्+वन्ध्य+द्रुमः ते दृशा फलितः।६३।

तेव्हा ज्योतिष्यांनी जातक वर्तविले की, 'ही कन्या साध्वी, सुशील गुणवान्, कुळाचा उद्धार करणारी आणि पुत्रवती होईल.'६१. ते भाकीत ऐकून त्या सोमनाथ ब्राह्मणाने ब्राह्मणांना दक्षिणा, वस्त्रे इत्यादि दिले. बाराव्या दिवशी ते दोघे पतिपत्नी कन्येला घेऊन श्रीगुरूंकडे आले.६२. त्यांच्या चरणकमलांच्या सन्निध त्या कन्येला ठेवून उभयतांनी नमस्कार केला आणि ती गंगा श्रीगुरूंना म्हणाली, 'अहं-ममतेने संसारात स्थिरावलेला हा वठलेला आणि वांझ देहरूपी वृक्ष आपल्या कृपाकटाक्षाने फळला आहे.'६३.

फळांनी बहरलेला वृक्षसुद्धा त्याची फळे चांगली असली तरच वाटसरू त्याला स्वीकारतात. **सुफल** म्हणजे पुत्रवान असला तरच वाटसरू म्हणजे स्वर्गलोकाची अपेक्षा असलेले पूर्वज अंगीकारतात. ऐतरेय ब्राह्मणानुसार पुत्र हा प्रकाशरूप मक्ती देणारा असतो तर पुत्री ही कष्टदायिनी असते. अर्थात् संतान होऊनही ती कन्या असेल तर मोघफलच नाही का? त्यापेक्षा वन्ध्यत्व बरे! असा तिचा अभिप्राय दिसतो. 'प्रभो, आपण जाणताच' असंही ती म्हणते आहे. पण हा अर्थ गौणपक्षी आहे असे श्रीमहाराज म्हणतात.

**सेव्यते फलितोऽपि द्रुः पान्थैश्चेत्सुफलो वरम्। वन्ध्योऽपि मोघफलत इति भातीश वेत्सि तत् ।।६४।।**

फलितः अपि द्रुः सुफलः चेत् पान्थैः सेव्यते। मोघ+फलतः वन्ध्यः अपि वरं इति भाति। (हे) ईश तत् वेत्सि।'६४।

मुख्यार्थ पुढीलप्रमाणे आहे. श्रीगुरूंच्या उपासनेने शुद्धचित्त ब्राह्मणीला कन्येच्या गर्भ वाढवण्याचे आणि प्रसूतीचे जे कष्ट झाले त्यांनीच वैराग्य उत्पन्न झाले. त्यामुळेच ह्या संततीपासून प्राप्त होणारी सुखे आणि लोक घेऊन काय करायचे? आत्मा हाच आपला नित्य आणि परमानंदस्वरूप लोक आहे असा तिचा निश्चय झाला. त्या भूमिकेतून ती बोलत आहे. **संसृतिस्थ** म्हणजे मी आणि माझे ह्या बुद्धीने संसारांत स्थिर झालेल्या, **जरत्** म्हणजे वृद्ध, पुरुषत्वाने प्राप्त होणारा कर्माधिकार नसलेली म्हणून **वंध्यः**, कर्माचरणाला अयोग्य, अर्थात् कर्मफलरहित म्हणजे वांझ **वृक्ष**, म्हणजेच पंचभूतांच्या संघातात्मक देह; तो आपल्या कृपाकटाक्षाने **फलित** झाला म्हणजे विवेक उत्पन्न झाला; तो **सुफलित** म्हणजे मोक्षर्पयवसायी झाला तरच **पान्थैः** म्हणजे मुमुक्षूंनी अंगीकारला जातो; अन्यथा **मोघफलतो** र्स्वगादिलक्षण नाशिवंत भोगांचे फल असेल तर तो त्याज्य ठरतो. त्यापेक्षा पाप-पुण्यविरहित (*वंध्यत्वं वरं*) निष्फलताच बरी. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. शंकरार्चायांनी कठोपनिषदांतील (२:३:१) '*ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख*' या मंत्रावरील भाष्यात केलेले समष्टिरूप आणि व्यष्टिरूप देहावरील रूपक दिले आहे. त्याचा भावार्थ असा -

'जन्म, जरा, मृत्यू, शोक आदि अनेक अनर्थांचा बनलेला; क्षणाक्षणाला रूप पालटणारा; माया, मृगजळ, आकाशांतील मेघांची गंधर्वनगरी यांसारख्या पाहता पाहता नष्ट होणाऱ्या स्वरूपाची; मृत्यूनंतर वृक्षाप्रमाणेच अभावात्मक; केळीच्या बुंध्यासारखा निःसार; पाखंड बुद्धीच्या शेकडो विकल्पांचे मूळ; तत्त्वाच्या जिज्ञासूंनी अनिर्धारित (अनिश्चित) 'इदं' तत्त्वस्वरूप; वेदांताने निश्चित केलेले परब्रह्म ज्याचे मूलसार (अधिष्ठान) आहे;

**तच्छ्रुत्वा सस्मितं कन्यामादायेशो जगाद तौ । शीलधीगुणपुत्राढ्या भवेत्साध्व्यखिलार्चिता ।।६५।।**

तत् श्रुत्वा ईशः सस्मितं कन्यां आदाय तौ जगाद। 'शील+धी+ गुण+पुत्र+आढ्या अखिल+अर्चिता साध्वी भवेत्।'६५।

अविद्या, काम, कर्म आणि अव्यक्त या बीजांपासून अंकुरणारा; परब्रह्मावेगळा, विज्ञान व क्रिया या शक्तिद्वयात्मक हिरण्यगर्भ ज्याचा अङ्कुर आहे; सर्व प्राणी आणि लिंगभेद या ज्याच्या फांद्या आहेत; तृष्णारूपी जलाच्या सिंचनाने ज्याला उग्र दर्प आहे; बुद्धी, इंद्रिय, विषय हेच ज्याची पालवी आहे; श्रुती, स्मृती, न्याय, विद्या, उपदेश ह्या ज्याच्या पाकळ्या आहेत; जो यज्ञ, दान, तप आदि कर्मरूपी फुलांनी बहरलेला आहे; सुख, दुःख, वेदना अशा अनेक रसांनी भरलेला; प्राण्यांच्या उपजीविकेच्या अनंत फळांनी लखडलेला; त्यांच्या तृष्णारूपी पाण्याच्या सिंचनाने ज्याच्या विस्तारलेल्या मुळ्या, एकमेकांत गुंतून जटिल आणि दृढ झाल्या आहेत; ब्रह्मादि पक्ष्यांनी सत्य आदि लोकांची घरटी ज्याच्यावर बांधली आहेत; प्राण्यांच्या सुखदुःखामुळे झालेल्या हर्ष-शोकांपासून प्रकटलेल्या नृत्य, गीत, वादन, क्रीडा, टाळ्या, हास्य, आक्रोश, रुदन, 'हा हा', 'सोड सोड' इत्यादि अनेक शब्दांच्या गदारोळाने झालेला क्षुब्धतम महाध्वनी; याचा उच्छेद केवळ वेदांतविहित ब्रह्मात्मदर्शनरूपी असंगशस्त्राने होतो.'६४. ते ऐकून श्रीगुरूंनी स्मितमुखाने त्या कन्येला उचलून घेतले आणि म्हणाले, 'ही शीलवती, बुद्धिमती, गुणवान्, पुत्रवती आणि सर्वांना पूज्य होईल.' इथे श्रीगुरूंनी आपल्या स्मिताने विवेकसंपन्न झालेल्या ब्राह्मणीवर आपली माया पसरली; कारण आधी दिलेल्या पुत्रप्राप्तीच्या आणि मुक्तीच्या वराचा अनुभव तिला द्यायचा होता.६५.

**कन्या लब्धोत्तमेयं वां पुत्रेच्छा चेद्भवेत्सुतः । मूर्खः शतायुर्वाल्पायुर्विद्वान्वां कतरः प्रियः ।।६६।।**
**सार्भो विद्वान् प्रियोऽल्पायुरपीत्यूचतुरप्युभौ । तथेत्युक्त्वा स सापत्यौ गमयामास तौ प्रभुः ।।६७।।**
**गर्भं साप्यल्पकालेन धृत्वासूत सुतं शुभम् । श्रद्धया निष्कलाप्येवं पुत्रौ लेभेऽथ किं वद ।।६८।।**
**विद्याविनयवान् भूत्वा पितृशुश्रूषणोद्यतः । धार्मिकः पञ्च पुत्रांस्तत्पुत्रो लब्ध्वामृतं ययौ ।।६९।।**
**कन्यापीशप्रसादात्सा दीक्षितस्य सती शुभा । भूत्वा गुरूक्तवद्ब्रह्म-वादिनी प्राप सद्गतिम् ।।७०।।**

'इयं उत्तमा कन्या लब्धा। वां पुत्र+इच्छा चेत् सुतः भवेत्। वां मूर्खः शतायुः, वा अल्पायुः विद्वान्, कतरः प्रियः?'।६६। 'अल्पायुः अपि स+अर्भः विद्वान् प्रियः।' इति उभौ ऊचतुः। 'तथा' इति उक्त्वा सः प्रभुः तौ स+अपत्यौ गमयामास।६७। सा अपि अल्पकालेन गर्भं धृत्वा शुभं सुतं असूत। एवं श्रद्धया निष्कला अपि पुत्रौ लेभे। अथ किं वद।६८। तत् पुत्रः धार्मिकः विद्या+विनयवान् भूत्वा पितृ+शुश्रूषण+उद्यतः पञ्च पुत्रान् लब्ध्वा अमृतं ययौ।६९। कन्या अपि ईश+प्रसादात् गुरु+उक्तवत् दीक्षितस्य शुभा सती ब्रह्मवादिनी भूत्वा सद्गतिं प्राप।७०।

'ही फार उत्तम कन्या तुम्हाला झाली. जर तुम्हाला मुलगा हवा असेल तर तोही होईल. तुम्हाला शतायुषी मूर्ख मुलगा आवडेल की अल्पायुषी पण विद्वान्?'६६. 'अल्पायुषी असला तरी आम्हाला विद्वान् आणि पुत्रवान् मुलगा आवडेल.' या त्यांच्या म्हणण्याला अनुमोदन देऊन त्या श्रीगुरूंनी त्यांची कन्येसहित पाठवणी केली.६७. 'अल्पकाळातच त्या गंगेने गर्भ धारण केला आणि छानशा मुलाला जन्म दिला. अशा रीतीने ऋतू गेलेला असतानाही श्रद्धेच्या बळावर त्या वृद्धेला दोन मुले लाभली. नामधारका, यापेक्षा श्रीगुरूंचे अधिक माहात्म्य काय सांगावे?'६८. त्यांचा तो मुलगा अत्यंत धार्मिक, विद्यावान् आणि विनयशील झाला. तो आईवडिलांच्या सेवेत तत्पर होता. त्याला पाच मुलगे झाल्यावर तो सद्गती पावला.६९. त्यांची ती गुणी कन्यासुद्धा श्रीगुरूंनी सांगितल्याप्रमाणे दीक्षिताची पत्नी आणि ब्रह्मवादिनी होऊन पतीसह सद्गती पावली. स्त्रियांना वेदपठणाचा अधिकार नसताना ती ब्रह्मवादिनी कशी झाली? या प्रश्नाचे उत्तर असे - उपनयनाभावी सांगशाखा वेदाच्या अध्ययनाचा अधिकार नसला, तरी दीक्षिताच्या पत्नीला मंत्रपाठ आणि श्रवणाचा अधिकार आहे.७०.

**एवं गुरुप्रभावोऽयं श्रद्धादृष्ट्यैव दृश्यते । सद्भक्तैर्न त्वभक्तैः स जन्मान्धैरिव भास्करः ॥७१॥**
**दण्डकुण्डीकरं शान्तं काषायाच्छादनं सदा । ध्यायन्तौ यतिरूपं तं दम्पती मुक्तिमापतुः ॥७२॥**
**श्रद्धाभक्त्यैव सुलभा गुरुवाक्यानुवर्तिनाम् । उभयी सिद्धिरप्यन्यच्चित्रं तच्चेष्टितं शृणु ॥७३॥**
**तत्रैत्य नरहर्याख्यो विप्रः कुष्ठी जगद्गुरुम् । प्रणतः शरणं प्राप्य प्रावोचद् गद्गदाक्षरः ॥७४॥**
**हरे शम्भो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत । भक्तवत्सल ते कीर्तिं श्रुत्वात्राप्तोऽस्मि सद्गुरो ॥७५॥**

एवं गुरु+प्रभावः। अयं श्रद्धा+दृष्ट्या एव सत्+भक्तैः दृश्यते। सः तु न अभक्तैः (दृश्यते) जन्मांधैः भास्कर इव।७१। दण्ड+कुण्डी+करं शान्तं काषाय+आच्छादनं यतिरूपं तं सदा ध्यायन्तं दम्पती मुक्तिं आपतुः।७२। गुरु+वाक्य+अनुवर्तिनां श्रद्धा+भक्त्या एव उभयी सिद्धिः सुलभा। अन्यत् अपि चित्रं तत् चेष्टितं शृणु।७३। तत्र नरहरि+आख्यः कुष्ठी विप्रः एत्य जगत्+गुरुं प्रणतं शरणं प्राप्य गद्गद+अक्षरः प्रावोचत्।७४। '(हे) हरे, शम्भो, परानन्द+मूर्ते, अच्युत, भक्त+वत्सल, सद्गुरो, जय, जय। ते कीर्तिं श्रुत्वा अत्र आप्तः अस्मि।'७५।

असा हा श्रीगुरूंचा प्रभाव आहे. मात्र श्रद्धारूपी दृष्टी असलेल्या सद्भक्तांनाच तो दिसतो. जन्मांधाला जसा सूर्य दिसत नाही, तसा अभक्तांना सद्गुरुमहिमा दिसत नाही. **श्रद्धा म्हणजे गुरू आणि शास्त्र यांनी उपदेशिलेल्या तत्त्वांवर आणि त्यांच्या प्राप्तीच्या उपायांवर परम विश्वास**.७१. एका हातात दंड आणि एका हातात कमंडलु धारण केलेल्या, भगवी छाटी पांघरलेल्या त्या यतिरूप सद्गुरूंचे निरंतर ध्यान करीत ते सोमनाथ आणि गंगा हे जोडपे मुक्त झाले.७२. गुरुवाक्याला अनुसरणाऱ्यांना श्रद्धायुक्त भक्तीनेच ऐहिक आणि पारलौकिक अशी दुहेरी सिद्धी सुलभ असते. आता श्रीगुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक.७३. तिथे गाणगापुरी एक नरहरी नावाचा कुष्ठी ब्राह्मण आला. त्याने सद्गुरूंना शरण जाऊन त्यांना साष्टांग नमस्कार केला आणि गहिवरलेल्या कंठाने आपली हकीकत सांगितली.७४. सद्गुरूंना लावलेली संबोधने हेतुगर्भ आहेत. हरी म्हणजे पाप हरण करणारा. शंभू म्हणजे आरोग्य देणारा. तसेच परानंदमूर्ती म्हणजे मोक्षदाता. भक्तवत्सल या नावाने त्यांच्या कृपेला आवाहन केले आहे. नरहरी म्हणतो, 'सद्गुरुमहाराज मी आपली कीर्ती ऐकून इथे आलो आहे.'७५.

**यजुर्विदोऽपि मे तुण्डं केऽपि नेक्षन्ति कुष्ठिनः । तीर्थार्चनजपैः कुष्ठं तन्मे नापैत्यघात्मनः ।।७६।।**
**कृपया तेऽपयायात् तदिति मत्वागतोऽस्म्यहम् । नास्ति चेत्तत्प्रतीकारः शंसाग्रेऽसूंस्त्यजामि ते ।।७७।।**
**तच्छ्रुत्वा प्राक्तनाघोत्थं कुष्ठं नश्येदिति प्रभुः । प्रोक्त्वा शुष्कौदुम्बरैधो दृष्ट्वावोचत्सकुष्ठिनम् ।।७८।।**
**मद्वाक्ये भक्तिमांश्चेत् तत्काष्ठमारोप्य सङ्गमे । भज पल्लविते तस्मिन्छुद्धोऽकुष्ठो भविष्यसि ।।७९।।**
**ओमित्युक्त्वा तदारोप्य श्रद्धाभक्त्या स सङ्गमे । भेजे दत्वाधारबन्धं परितोऽम्बुनिषेचनैः ।।८०।।**

'यजुः+विदः अपि मे कुष्ठिनः के अपि तुण्डं न पश्यति। मे अघ+आत्मनः तत् कुष्ठं न अपैति।'७६। 'ते कृपया तत् अपयायात् इति मत्वा अहं आगतः अस्मि। तत् प्रतीकारः नास्ति चेत् शंस, ते अग्रे असून् त्यजामि।'७७। तत् श्रुत्वा प्रभुः 'प्राक्तन+अघ+उत्थं कुष्ठं नश्येत्' इति प्रोक्त्वा शुष्क+औदुम्बर+एधः दृष्ट्वा सः कुष्ठिनं अवोचत्।७८। 'मत्+वाक्ये भक्तिमान् चेत् तत् काष्ठ सङ्गमे आरोप्य भज। तस्मिन् पल्लविते शुद्धः अकुष्ठः भविष्यसि।'७९। 'ॐ' इति उक्त्वा सः श्रद्धा+भक्त्या तत् सङ्गमे आरोप्य, आधार+बन्धं दत्वा, परितः अम्बु+निषेचनैः भेजे।८०।

'मी यजुर्वेद जाणणारा ब्राह्मण असूनही कुष्ठी म्हणून कुणी माझे तोंडसुद्धा पाहात नाहीत. ते कुष्ठ घालविण्यासाठी तीर्थयात्रा, अनेक देवांच्या पूजा आणि जपादिक खूप प्रयत्न केले. पण माझ्या पापाविष्ट देहाची शुद्धी होत नाही.'७६. 'आपल्या कृपेने त्याचा परिहार होईल अशा आशेने मी आलो आहे. जर त्याचा कांही प्रतिकारच नसेल तर तसे सांगा, मी इथेच आपल्या समोर प्रायोपवेशनाने प्राणत्याग करतो.'७७. त्याचे ते बोलणे ऐकून श्रीगुरू म्हणाले, 'पूर्वकर्मांच्या पापामुळे उद्भवलेले हे कुष्ठ नष्ट होईल.' समोर एक औदुंबराचे वाळलेले लाकूड पाहून ते त्या कुष्ठग्रस्ताला म्हणाले.७८. 'माझ्या वाक्यावर तुझी श्रद्धा असेल तर हे लाकूड घेऊन संगमावर लाव आणि त्याला पाणी घालणे इत्यादी सेवा कर. त्या लाकडाला पालवी फुटली की तू शुद्ध होशील आणि तुझे कुष्ठ नाहीसे होईल.'७९. 'ॐ' असे म्हणून ते मान्य करीत त्याने ते वाळलेले लाकूड संगमावर नेऊन तिथे त्याचे आरोपण केले, त्याला आधार देऊन व आळे करून त्याला पाणी घालून त्याची श्रद्धा व भक्तीपूर्वक उपवास करीत सेवा आरंभली.८०.

**कृपाऽस्य सद्यस्तव शुद्ध्यभावादुक्तं फलं कष्टमिदं कुतोऽस्मिन् ।**
**शंकाकुरस्यात इदं त्यजेति जनैर्निषिद्धोऽप्यभजत्सदेध्मम् ।।८१।।**
**तदैत्य ते गुरुं प्राहुर्भवद्वाक्याद्द्विजो जरत् । भजतीध्मं बोधय तं मरिष्यत्युपवासतः।।८२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**करोति साधु तद्विप्रो दृढभक्त्या तरिष्यति । भक्तिर्हि तारकात्रैव भवसिन्धुनिमज्जतः ।।८३।।**
**मन्त्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भि(भे)षजे गुरौ । यादृशी भावना यस्य तस्य सिद्धिस्तु तादृशी ।।८४।।**

'अस्य कृपा सद्यः। तव शुद्धि+अभावात् इदं कष्टं फलं उक्तम्। अस्मिन् अङ्कुरस्य शङ्का कुतः? इदं त्यज।' इति जनैः निषिद्धः अपि (द्विजः) सदा इध्मं अभजत्।८१। तदा ते गुरुं एत्य प्राहुः, 'भवत् वाक्यात् द्विजः जरत् इध्मं भजति। तं बोधय। (अन्यथा) उपवासतः मरिष्यति।'८२। श्रीगुरुः उवाच। तत् विप्रः साधु करोति। दृढ भक्त्या तरिष्यति। अत्र भव+सिन्धु+निमज्जतः भक्तिः एव तारका हि।८३। मन्त्रे, तीर्थे, द्विजे, देवे, दैवज्ञे, भिषजे, गुरौ यस्य यादृशी भावना तस्य तु तादृशी सिद्धिः।८४।

त्याने चालवलेली ती काष्ठसेवा पाहून त्याची दया येऊन कांही लोक त्याला म्हणाले, 'आमच्या श्रीगुरूंची दर्शनमात्रे कृपा होते. तुझ्या पापाला निष्कृती नसेल म्हणून हे कष्टरूपी पापनाशक फळ तुला सांगितले आहे. या वाळून कोळ झालेल्या लाकडाला अंकुर फुटण्याची शंका तरी आहे का? तू हा व्यर्थ खटाटोप सोड.' लोकांनी अनेक वेळा समजावूनही तो ब्राह्मण मात्र त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्या काष्ठाची सेवा करीत राहिला.८१. तेव्हा ते लोक श्रीगुरूंकडे गेले आणि म्हणाले, 'आपल्या वचनानुसार तो कुष्ठी ब्राह्मण खरोखरच ते वाळलेले लाकूड रोपून त्याला पाणी घालतो आहे. त्याला आपणच समजावून सांगा. नाहीतर उपवासांनी तो मरायचा!'८२. श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'तो ब्राह्मण उत्तमच करतो आहे. त्याच्या ह्या दृढ भक्तीने तो तरून जाईल. जितका भाव दृढ असेल तितकेच फलही निश्चित मिळते. ह्या भूलोकात संसारसागरात बुडणाऱ्याला भक्तीच खरोखर तारून नेते. मंत्र, तीर्थ, ब्राह्मण, देव, ज्योतिषी, वैद्य (किंवा औषध) तसेच गुरू यांच्याविषयी ज्याची जशी भावना असेल त्याप्रमाणेच फळ मिळते.'८४.

**वच्मि सूतर्षिसंवादं प्राग्वृत्तं दृढभक्तिदम् । ऋषीन्सूतो जगादेदं सिंहकेतुनृपात्मजः ।।८५।।**
**धनञ्जयाख्यः पाञ्चाल एकदा वनमभ्यगात् । दृष्ट्वा स मृगयाश्रान्तस् तत्र जीर्णं शिवालयम् ।।८६।।**
**तस्थौ तत्र क्षणं साकं शबरेणानुयायिना । दृष्ट्वा लिङ्गानि रम्याणि दूतः प्राह नृपं गृहे ।।८७।।**
**लिङ्गं नीत्वा पूजयितुं कांक्षेऽज्ञोऽस्म्यनुशाधि माम् । यदाज्ञापयसे देव दृढभक्त्या करोमि तत् ।।८८।।**

**।। राजपुत्र उवाच ।।**

**संस्थाप्य सत्स्थले लिङ्गं शुचिर्भूत्वा स्त्रियान्वितः । भक्त्या पूजय मत्वेशमुपचारैर्यथाविधि ।।८९।।**

दृढभक्तिदं प्राक् वृत्तं सूत+ऋषि+संवादं वच्मि। सूतः ऋषीन् इदं जगाद। पाञ्चाले सिंहकेतु+नृप+आत्मजः धनंजय+आख्यः एकदा वनं अभ्यगात्। तत्र सः मृगया श्रान्तः जीर्णं शिव+आलयं दृष्ट्वा तत्र शबरेण अनुयायिना साकं क्षणं तस्थौ। दूतः रम्याणि लिङ्गानि दृष्ट्वा नृपं प्राह। 'लिङ्गं गृहे नीत्वा पूजयितुं काङ्क्षे। अज्ञः अस्मि। मां अनुशाधि। (हे) देव यत् आज्ञापयसे तत् दृढभक्त्या करोमि।'८५-८८। राजपुत्र उवाच। 'लिङ्गं सत्स्थले संस्थाप्य शुचिः भूत्वा स्त्रिया+अन्वितः ईशं मत्वा भक्त्या यथाविधि उपचारैः पूजय।'८९।

श्रीगुरू त्या लोकांना पुढे म्हणतात, 'पूर्वीची एक घडलेली गोष्ट सूत आणि शौनकादि ऋषींच्या संवादरूप तुम्हाला सांगतो. सूतांनी ऋषींना सांगितले. पांचाल देशात सिंहकेतू राजाचा धनंजय नावाचा मुलगा वनात शिकारीसाठी गेला होता. मार्गात थकल्यामुळे तो आपल्या बरोबर असलेल्या भिल्ल चाकरासह एका जुन्या शिवमंदिराजवळ किंचित् काळ थांबला. त्या भिल्ल नोकराने तिथे पडलेली अनेक सुंदर लिंगे पाहिली आणि तो राजपुत्राला म्हणाला, 'महाराज यातील एखादे लिंग नेऊन घरी त्याची पूजा करावी अशी मला इच्छा होत आहे. पण मी अज्ञानी आहे. पूजा कशी करायची वगैरे मला माहीत नाही. गुरुदेवा, आपणच मला उपदेश करावा. आपण जशी आज्ञा कराल तसे मी सर्व दृढ भक्तीने करीन.'८८. राजपुत्राने त्याला सांगितले, 'ते लिंग चांगल्या पवित्र स्थळी ठेवावे. स्नानादींनी शुद्ध होऊन स्त्रीसह ते लिंग म्हणजे प्रत्यक्ष भगवान् शंकर आहेत अशी भावना करून भक्तीपूर्वक यथाविधी उपचारांनी पूजा करावी.'८९.

**चिताभस्मान्वहं देयं दत्तान्नं भुङ्क्ष्व भार्यया । प्रसादबुद्ध्येत्युक्त्वा स पूजाविधिमुपादिशत् ।।९०।।**
**सोऽपि तुष्टो गृहीत्वैकं लिङ्गं गत्वा गृहं स्त्रिया । भेजे यथोपदेशं तद् भस्मादात्प्रत्यहं मुदा ।।९१।।**
**भस्मैकस्मिन्दिने क्वापि न लेभेऽभूत्स दुर्मनाः । तद्भार्या प्राह मां दग्ध्वा शम्भवेऽर्पय भस्म तत् ।।९२।।**
**शरीरं कृमिविड्भस्म-रूपान्तं क्षणभङ्गुरम् । तत्साफल्यं कुरु हरे भस्मार्पणनिमित्ततः ।।९३।।**

'अनु+अहं चिता+भस्मं देयम्। दत्त+अन्नं प्रसाद+बुद्ध्या भार्यया भुङ्क्ष्व।' इति उक्त्वा सः पूजाविधिं उपादिशत्। ९०। सः अपि तुष्टः लिङ्गं गृहीत्वा गृहं गत्वा तत् स्त्रिया यथा+उपदेशं भेजे। प्रति अहं मुदा भस्म अदात्।९१। एकस्मिन् दिने क्व अपि भस्म न लेभे। सः दुर्मनाः अभूत्। तत्+भार्या प्राह, 'मां दग्ध्वा तत् भस्म शम्भवे अर्पय।'९२। कृमि+विट्+भस्म+रूप+अन्तं क्षणभङ्गुरं शरीरं हरे भस्म+अर्पण+निमित्ततः तत् साफल्यं कुरु।

'रोज त्याला चिताभस्म द्यावे. त्याला नैवेद्य दाखविलेले अन्न प्रसाद मानून पत्नीसह भक्षण करावा.' असे सांगून राजपुत्राने त्याला पूजेचा विधी समजावून सांगितला.९०. तो शबर प्रसन्न चित्ताने लिंग घेऊन घरी गेला आणि राजपुत्राच्या उपदेशानुसार स्त्रीसह त्याची पूजा करू लागला. रोज आनंदाने तो लिंगासाठी चिताभस्म आणीत असे. एके दिवशी खूप शोधूनही कुठेच चिताभस्म मिळाले नाही. तेव्हा तो अत्यंत खिन्न झालेला पाहून त्याची पत्नी म्हणाली, 'तुम्ही मलाच जाळून ते भस्म भगवान् शंकरांना अर्पण करा.'९२. 'हया क्षणभंगूर नाशिवंत शरीराचे शेवटी कृमी, विष्ठा, भस्म यांच्यातच परिवर्तन होणार आहे. शिवाला भस्म देण्यासाठी याचा विनियोग करून त्याचे साफल्य करा.'९३.

**।। शबर उवाच ।।**

**तिष्ठत्स्विनक्ष्माग्निषु साक्षिषु प्रिये भर्तृत्वमाश्रुत्य वृतास्यदोऽन्यथा ।**
**कुर्यां कथं तन्वि किशोरि बालिके भो साध्व्यलब्धैहिकसौख्य उत्तमे ।।९४।।**
**सा प्राह मोहो वितथोऽयमध्रुवे येन ध्रुवं साहजिकं प्रसाध्यते ।**
**तत्साधयास्मिन्परकीयकल्पना नास्त्येव तेऽर्धाङ्गविभाग्यदो वपुः ।।९५।।**
**प्रोक्ते सुयुक्ते प्रियया तथेत्यसौ प्रोक्त्वा गृहे तामवरुद्ध्य सालयाम् ।**
**दग्ध्वार्पयद्भस्म शिवाय नित्यवद् भ्रान्त्या प्रसादक्षण आह्वयत्प्रियाम् ।।९६।।**

'(हे) प्रिये इन+क्ष्मा+अग्निषु तिष्ठत्सु भर्तृत्वं आश्रुत्य वृता असि। भो किशोरि, तन्वि बालिके साध्वि, अलब्ध+ऐहिक+सौख्ये, उत्तमे, अदः अन्यथा कथं कुर्याम्?'।९४। सा प्राह। 'अयं अध्रुवे वितथः मोहः। येन साहजिकं ध्रुवं प्रसाध्यते तत् साधय। अस्मिन् देहे परकीय कल्पना नास्ति एव। अदः वपुः ते अर्ध+अङ्ग+विभागी।'९५। प्रियया सुयुक्ते प्रोक्ते 'तथा' इति असौ प्रोक्त्वा तां गृहे अवरुद्ध्य स+आलयां दग्ध्वा (तत्) भस्म नित्यवत् शिवाय अर्पयत्। प्रसाद+क्षणे भ्रान्त्या प्रियां आह्वयत्।९६।

तिचा तो आग्रह पाहून तो शबर तिला म्हणाला, 'प्रिये सूर्य, भूमी आणि अग्नी यांच्या साक्षीने तुझा पोशिंदा, रक्षणकर्ता म्हणून मी तुझा अंगीकार केला आहे. हे असे विपरीत कृत्य मी कसे करू? तुझ्यासारख्या कोवळ्या वयाच्या सुंदर तरुणीची, जिने अजून पुत्रादि संसारसुखाचा अनुभवही घेतलेला नाही, मी कशी हत्या करू शकेन?'९४. ती शबरी म्हणाली, 'ह्या नाशिवंत शरीराचा हा मिथ्या मोह आहे. ज्याने चिरंतन स्वरूपाची प्राप्ती होईल असे कांही करा. शिवाय ह्या शरीराविषयीचे परकेपण मनातून काढून टाका. हे घटाप्रमाणे इंद्रियगोचर स्थूल शरीर तुमचे हक्काचे अर्धांग आहे.' आपल्या पत्नीचे ते सयुक्तिक बोलणे त्याला पटले. 'ठीक तर! तसेच करतो,' असे म्हणून त्याने तिला घरात कोंडून घातले आणि घरासहित तिला जाळून टाकले. मग ते भस्म घेऊन नित्याप्रमाणे पूजा केली. प्रसाद घेताना नेहमीच्या संवयीने त्याने आपल्या प्रिय पत्नीला हाक मारली.९६.

**दग्धापि साह्वानत आप पूर्ववत् तां सद्म चालोक्य स शङ्कितोऽब्रवीत् ।**
**दग्धापि गेहेन सहागता कथं सुप्तोत्थितास्मीति शबर्युवाच तम् ।।९७।।**
**शम्भुप्रभावोऽस्त्विवति तेन भाषिते द्राक्प्रादुरासीन्निजरूपधृक् शिवः ।**
**दौष्कुल्यदोषं परिहृत्य दर्शनात् ताभ्यां शिवोऽदादुभयत्र काङ्क्षितम् ।।९८।।**
**भक्तेः प्रभावोऽयमियान्न किञ्चित् फलत्यृते भक्तिमतोऽस्य सिद्ध्येत् ।**
**भक्त्येष्टमित्याह स तान्कदाचिद् गच्छन्प्रभुः स्नातुममुं ददर्श ।।९९।।**

सा दग्धा अपि आह्वानतः पूर्ववत् आप। तां, सद्मं च आलोक्य सः शङ्कितः अब्रवीत्। 'गेहेन सह दग्धा अपि कथं आगता?' शबरी तं उवाच, 'सुप्ता उत्थिता अस्मि' इति।९७। 'शम्भु+प्रभावः अस्तु' इति तेन भाषिते, द्राक् शिवः निज+रूप+धृक् प्रादुरासीत्। दर्शनात् दौष्कुल्य+दोषं परिहृत्य ताभ्यां शिवः उभयत्र काङ्क्षितं अदात्।९८। 'अयं इयान् भक्तेः प्रभावम्। भक्तिं ऋते किञ्चित् (अपि) न फलति। अतः अस्य भक्त्या इष्टं सिद्ध्येत्' इति सः तान् आह। कदाचित् प्रभुः स्नातुं गच्छन् अमुं ददर्श।९९।

ती जळून गेलेली असूनही हाकेसरशी आली. तिला पाहून चकित झालेल्या शबराने पाहिले तर घरही पूर्ववत् झालेले. त्याने आश्चर्याने तिला विचारले, 'तू तर जळाली होतीस, मग कशी आलीस?' ती उत्तरली, 'मी तर झोपले होते. तुमच्या हाकेने जागी झाले.'९७. 'ही त्या शंभूचीच कृपा,' असे तो शबर म्हणत असतानाच भगवान् शंकर आपल्या सगुण रूपाने प्रकट झाले. आपल्या दर्शनाने त्यांनी त्या दंपतीचा कुलहीनतेचा दोष दूर केला आणि त्यांना ऐहिक आणि पारलौकिक वैभव अर्पण केले.९८. श्रीगुरू म्हणतात, 'हा असा भक्तीचा प्रभाव आहे! भक्तीविना किंचित् सुद्धा फळ लाभत नाही. म्हणून ह्या ब्राह्मणाचे इष्ट त्याला त्याच्या भक्तीनेच मिळेल,' असे त्या लोकांना त्यांनी सांगितले. पुढे एकदां श्रीगुरू स्नानासाठी संगमावर जात असता त्यांनी त्या ब्राह्मणाला पाहिले.९९.

**तं तादृशं प्रेक्ष्य कमण्डलुस्थ-क्षीरेण तत्प्रोक्ष्य स शुष्ककाष्ठम् ।**
**ददर्श सद्दिव्यदृशा तदेध्मे सद्योङ्कुरा भूरिश आविरासन् ।।१००।।**
**दिव्यं स्वधामाङ्कुरितं च काष्ठमदृष्टकुष्ठोऽग्रत आस्थितं तम् ।**
**दृष्ट्वा स काष्ठार्पितदृष्टिमीशं तुष्टाव सत्प्रेमभरानताङ्गः ।।१०१।।**

तादृशं तं प्रेक्ष्य सः कमण्डलुस्थ क्षीरेण तत् शुष्क+काष्ठं प्रोक्ष्य सत+्दिव्य+दृशा ददर्श। तदा इध्मे भूरिशः अङ्कुराः आविरासन्।१००। अदृष्ट+कुष्ठः,दिव्यं स्वधाम, अङ्कुरितं च काष्ठं, अग्रतः आस्थितं तं दृष्ट्वा सः ं सत्+प्रेम+भर+आनत+अङ्गः काष्ठ+अर्पित+दृष्टिं ईशं तुष्टाव।१०१।

त्याला तसे दृढ भक्तीने लाकडाला पाणी घालताना पाहून श्रीगुरूंनी आपल्या कमं डलूतले पाणी त्या सुक्या लाकडावर शिंपडले आणि आपल्या संजीवन दिव्यदृष्टीने पाहिले. तो काय, ते काष्ठ भरपूर पालवीने बहरून गेलेले!१००.

त्याच वेळी त्या ब्राह्मणाचे कुष्ठ निघून गेले आणि त्याचा देह सुवर्ण झाला. ती औदुंबराची कोवळी पाने आणि आपली कांतियुक्त काया पाहून आनंदाने, कृतज्ञतेने आणि सात्त्विक प्रेमभराने झुकलेल्या देहाने नरहरी सद्गदित कंठाने काष्ठावर दृष्टी असलेल्या श्रीगुरूंना उद्देशून पुढील उत्स्फूर्त स्तोत्र गाऊ लागला (हे उपजाती वृत्तांतील अष्टक आहे).१०१.

**कोट्यर्कभं कोटिसुचन्द्रशान्तं विश्वाश्रयं देवगणार्चिताङ्घ्रिम् ।**
**भक्तप्रियं त्वात्रिसुतं वरेण्यं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०२।।**
**मायातमोऽर्कं विगुणं गुणाढ्यं श्रीवल्लभं स्वीकृतभिक्षुवेषम् ।**
**सद्भक्तसेव्यं वरदं वरिष्ठं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०३।।**

कोटि+अर्क+भं कोटि+सुचन्द्र+शान्तं विश्व+आश्रयं देव+गण+अर्चित+अङ्घ्रिं भक्त+प्रियं वरेण्यं त्वां अत्रिसुतं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।२। माया+तमः अर्कं, विगुणं गुण+आढ्यं, श्रीवल्लभं, स्वीकृत+भिक्षु+वेषं, सत्+भक्त+सेव्यं, वरदं वरिष्ठं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।३।

कोटी सूर्यांसारखा तेजस्वी असूनही जो कोटी चंद्राप्रमाणे शांत (आल्हादक) आहे, ज्याच्या अधिष्ठानावर हे विश्व स्थिरावले आहे, देवांचे समूह ज्याच्या चरणांची पूजा करीत आहेत, भक्तांना प्रिय असणाऱ्या, निरतिशयानंदरूप, साक्षात् अत्रिनंदन दत्तात्रेयच अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!२. विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत (६:१२५) सांगितल्याप्रमाणे तमोरूप असलेल्या मायेचा (*माया चेयं तमोरूपा*) निरास करणारा जो सूर्य आहे, सर्व गुणांचा आकर असूनही जो गुणातीत आहे, प्रत्यक्ष लक्ष्मीचा पती असूनही ज्याने संन्यासी वेष धारण केला आहे, सद्भक्तांना सेवनीय अशा वरदात्या श्रेष्ठ नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!३.

**कामादिषण्मत्तगजाङ्कुशं त्वामानन्दकन्दं परतत्त्वरूपम् ।**
**सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०४।।**
**सूर्येन्दुगुं सज्जनकामधेनुं मृषोद्यपञ्चात्मकविश्वमस्मात् ।**
**उदेति यस्मिन्रमतेऽस्तमेति वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०५।।**
**रक्ताब्जपत्रायतकान्तनेत्रं सद्दण्डकुण्डीपरिहापिताघम् ।**
**श्रितस्मितज्योत्स्नमुखेन्दुशोभं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०६।।**

कामादि+षट्+मत्त+गज+अङ्कुशं आनन्द+कन्दं पर+तत्त्व+रूपं, सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारं, त्वां वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।४। सूर्य+इन्दु+गुं, सत्+जन+काम+धेनुं, मृषोद्य+पञ्चात्मक+विश्वं अस्मात् उदेति, यस्मिन् रमते, अस्तं एति वन्दे, (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।५। रक्त+अब्ज+पत्र+आयत+कान्त+नेत्रं, सत्+दण्ड+कुण्डी+परिहापित+अघं, श्रित+स्मित+ज्योत्स्न+मुख+इन्दु+शोभं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।६।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर या माजलेल्या हत्तींना आवरणारा अंकुश असा आनंदाचा कंद - म्हणजेच आनंदवल्लीत वर्णिलेल्या मानुष आनंदापासून प्रजापतीच्या आनंदापर्यंतच्या सर्व आनंदांचा स्रोत (*यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसत।* ऋग्वेद संहिता ९:११३:११), परमतत्त्वस्वरूप निरुपाधिक ब्रह्मस्वरूपी, साधू आणि धर्म यांच्या रक्षणाकरिता अवतरलेल्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!४. सूर्य आणि चंद्र ज्याचे डोळे आहेत, सद्भक्तांसाठी जो कामधेनू आहे, हे मिथ्याभूत पाचभौतिक जग ज्या अभिन्ननिमित्तोपादान कारणापासून, दोरीवर सर्प भासावा, तसे उगवते, ज्याच्यात विलसते आणि ज्याच्यात पुनः पाण्यात बुडबुडे विरावे तसे मावळते त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!५. लाल कमळाच्या पानासारखे आकर्ण विशाल नेत्र असलेल्या, आपल्या सात्त्विक दंड आणि कमंडलू यांनी भक्तांची पापे पळवून लावणाऱ्या, ज्याचा मुखचंद्रमा स्मितरूपी चांदण्याने उजळला आहे अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!६.

**नित्यं त्रयीमृग्यपदाब्जधूलिं निनादसद्बिन्दुकलास्वरूपं ।**
**त्रितापतप्ताश्रितकल्पवृक्षं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०७।।**
**दैन्याधिभीकष्टदवाग्निमीड्यं योगाष्टकज्ञानसमर्पणोत्कम् ।**
**कृष्णानदीपञ्चसरिद्युतिस्थं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०८।।**
**अनादिमध्यान्तमनन्तशक्तिमतर्क्यभावं परमात्मसंज्ञं ।**
**व्यतीतवाग्हृत्पथमद्वितीयं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०९।।**

नित्यं त्रयी+मृग्य+पद+अब्ज+धूलिं, निनाद+सत+्बिन्दु+कला+स्वरूपं, त्रि+ताप+तप्त+आश्रित+कल्पवृक्षं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।७। दैन्य+आधि+भी+कष्ट+दव+अग्निं, ईड्यं, योग+अष्टक+ज्ञान+समर्पण+उत्कं, कृष्णा+पञ्च+सरित्+युति+स्थं वन्दे। (हे)नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।८। अन्+आदि+मध्य+अन्तं, अनन्त+शक्तिं अतर्क्य+भावं, परमात्म+संज्ञं, व्यतीत+वाक्+हृत्+पथं, अद्वितीयं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।१०९।

वेदांची त्रयी (ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद) सतत ज्या नित्य पुरुषाच्या चरणकमलांच्या धुळीचा मागोवा घेत असते (पण जिला ती गवसत नाही), नाद, बिन्दू आणि कला या स्वरूपांत योगिजन ज्याचे ध्यान करतात, संसाराच्या आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक तापांनी पोळलेले ज्या कल्पवृक्षाचा आसरा घेतात त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०७. जो दारिद्र्य, मनस्ताप, भय आणि क्लेश यांच्या वनांना जाळणारा अग्नी आहे, जो सर्वांना स्तुत्य आहे, जो (भक्तांना, साधकांना आणि यतींना) अष्टांग योगाचे ज्ञान समर्पण करण्यास सदैव उत्सुक असतो, अशा कृष्णा आणि पंचनदी यांच्या संगमावर निवसणाऱ्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०८. ज्याला ना आदि आहे, ना मध्य ना अंत, ज्याच्या सामर्थ्याला सीमाच नाही, ज्याचा भाव (अभिप्राय) अतर्क्य आहे, ज्याला परमात्मा म्हणतात आणि जो वाचा आणि मन आणि यांच्या आवाक्याबाहेर आहे त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर! **वाग्हृत्पथम्** याऐवजी **वाग्दृक्पथम्** असाही पाठ आहे.१०९.

**स्तोत्रे क्व ते मेऽस्त्युरुगाय शक्तिश् चतुर्मुखो वै विमुखोऽत्र जातः ।**
**स्तुवन्द्विजिह्वोऽभवदीश्वर त्वां सहस्रवक्त्रश्चकितोऽपि वेदः ।।११०।।**
**स्तुत्वैवं प्रणतीश्चक्रे तमाश्वास्याब्रवीद्विभुः । मत्प्रसादान्महत्त्वश्री-कीर्तिसत्पुत्रवान्भव ।।१११।।**
**शिष्योत्तम त्वं योगज्ञो भविष्यसि कुलं च ते । त्वद्वद्भविष्यत्यानीय वधूं तिष्ठ ध्रुवं त्विह ।।११२।।**
**तथेत्युक्त्वा द्विजो भार्यामानीय स तया सह । तत्र तस्थौ ततो लेभे पुत्रान्पुत्रीं स सत्तमान् ।।११३।।**
**विद्यासरस्वतीमन्त्रं गुरुदत्तं जपन्वरम् । भेजे गुरुं भवासक्तो जीवन्मुक्तोऽभवद् द्विजः ।।११४।।**

(हे) उरु+गाय ते स्तोत्रे मे क्व शक्तिः? अत्र चतुर्मुखः वै विमुखः जातः। (हे) ईश्वर, त्वां स्तुवन् सहस्र+वक्त्रः द्वि+जिव्हः अभवत्। वेदः अपि चकितः।११०। एवं स्तुत्वा प्रणतीः चक्रे। विभुः तं आश्वास्य अब्रवीत्। 'मत् प्रसादात् महत्त्व+श्री+कीर्ति+सत्पुत्र+वान् भव। (हे) शिष्य+उत्तम, त्वं योगज्ञः भविष्यसि। ते कुलं च त्वत्+वत् भविष्यति। वधूं आनीय इह तु ध्रुवं तिष्ठ।'१११-१२। द्विजः 'तथा' इति उक्त्वा भार्यां आनीय तया सह सः तत्र तस्थौ। ततः सः सत्तमान् पुत्रान् पुत्रीन् लेभे। गुरुदत्तं वरं विद्या+सरस्वती+मन्त्रं जपन् गुरुं भेजे। द्विजः भव+असक्तः जीवन्+मुक्तः अभवत्।११३-१४।

हे प्रभो, आपली कीर्ती थोरामोठ्यांनी गाइली आहे. मला एवढे सामर्थ्य कुठे आहे? ब्रह्मदेव चार मुखांनी आपले यश गाऊन थकला. हजार मुखांच्या शेषाच्याही जिभा तुला स्तवून फाटल्या. वेदही (नेति नेति म्हणत) स्तंभित झाले, तर आपल्या स्तवनाला माझी शक्ती कशी पुरी पडेल?११०.

अशी स्तुती करून त्या ब्राह्मणाने श्रीगुरूंना लोटांगणे घातली. प्रभू त्याला आश्वासन देत म्हणाले, 'माझ्या कृपाप्रसादाने तुला मोठेपण, संपत्ती, कीर्ती आणि सत्पुत्रांचा लाभ होईल. तुझा वंशही तुझ्यासारखाच होईल. आता तू आपल्या पत्नीला घेऊन ये आणि इथे गाणगापुरातच कायम राहा.'१११-१२. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो नरहरी ब्राह्मण पत्नीला घेऊन येऊन गाणगापुरातच राहिला. पुढे त्याला उत्तम पुत्र आणि कन्या झाले. श्रीगुरूंनी दिलेल्या श्रेष्ठ विद्यासरस्वती मंत्राचा जप करीत तो गुरूंची भक्ती करीत राहिला. त्या गुरुभजनाच्या प्रभावाने तो संसारातून विरक्त होऊन जीवन्मुक्त झाला.११३-१४.

**तत्कुलं चापि तत्तुल्यं तद्भक्तिमहिमा त्वियान् । त्वत्पूर्वजोऽपि तत्तुल्यस् तस्मात्ते मतिरीदृशी ।।१५।।**
**सद्गुरोस्तु प्रसादोऽयं भविष्यत्यपि ते कुले । वर्धमानः सदैवेति संविन्मे ब्राह्मण ध्रुवा ।।११६।।**

**।। इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिमहिमावर्णनं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

**।। आदित एकोनविंशोऽध्यायः ।।**

**सप्ताहपारायणे पञ्चमः । अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिनारम्भे गुरुस्तुतिः ।**

तत् कुलं अपि तत् तुल्यम्। इयान् तत्+भक्ति+महिमा। त्वत्+पूर्वजः अपि तत्+तुल्यः। तस्मात् ते ईदृशी मतिः।१५। (हे) ब्राह्मण, अयं सद्गुरोः सदा एव वर्धमानः प्रसादः तु, ते कुले अपि भविष्यति इति मे ध्रुवा संवित्।११६।

मुंडकोपनिषदाच्या वचनाप्रमाणे (*न अस्याऽब्रह्मवित्कुले।* ३:२:९), त्याचे वंशजही त्याच्यासारखे गुरुभक्त झाले. असा श्रीगुरूंच्या भक्तीचा महिमा आहे. तुझे पणजोबाही त्या नरहरीसारखेच होते. म्हणून तर तुझी बुद्धी अशी गुरुभजनप्रवण आहे. अरे नामधारका, हा सद्गुरूंचा सतत वर्धिष्णु कृपाप्रसाद तुझ्याही वंशावरही राहणार आहे अशी ग्वाही माझे मन देत आहे.११५-१६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पहिला आणि प्रथमपासून एकूणविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ विंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**को मत्पूर्वः कथं तेन सेवितो भगवान्प्रभुः । यत्प्रभावान्ममेदृग्धीस् तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**प्रागुक्तं यवनात् त्रातः सायंदेव इति प्रिय । पूर्वः स एव तेऽश्रौषीद्गुरुं गन्धर्वपूःस्थितम् ।।२।।**
**तत्रैत्य प्रणतो विप्रो मठे दृष्ट्वा परात्परम् । नत्वा दण्डवदस्तौषीदुपसंगृह्य पद्द्वयम् ।।३।।**
**परमात्मन्परञ्ज्योतिः श्रीनृसिंहसरस्वति । भक्तेश श्रुतिचिन्त्यं ते सर्वतीर्थाश्रयं पदम् ।।४।।**

नामधारक उवाच। यत् प्रभावात् मम ईदृक् धीः कः मत्+पूर्वः? तेन कथं भगवान् प्रभुः सेवितः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।१। सिद्ध उवाच। (हे) प्रिय, प्राक् यवनात् सायंदेवः त्रातः इति उक्तम्। सः एव ते पूर्वः गुरुं गन्धर्वपुरं स्थितं अश्रौषीत्।२। प्रणतः विप्रः तत्र एत्य परात्परं दृष्ट्वा दण्डवत् नत्वा पद्+द्वयं उपसंगृह्य अस्तौषीत्।३। (हे) परमात्मन्, परंज्योतिः, श्रीनृसिंहसरस्वति, भक्तेश श्रुति+चिन्त्यं ते पदं सर्व+तीर्थ+आश्रयम्।४।

*विसाव्यांत परीक्षूनि सायंदेवावरि प्रसाद करिती। श्रीगुरु काशीयात्रा तसे अनंतव्रत निरूपिती।।१।।* नामधारकाने विचारले, ‘आपण ज्या माझ्या पूर्वजामुळे माझी अशी सद्बुद्धी झाली म्हणता तो कोण? त्याने सद्गुरू भगवानांची कशा प्रकारे सेवा केली? हे ऐकण्यास मी सादर आहे.१. सिद्ध म्हणतात, ‘मागे नवव्या अध्यायात ज्या सायंदेवाचे यवनापासून रक्षण केले असे सांगितले, त्याच तुझ्या पूर्वजाच्या कानांवर श्रीगुरू गाणगापुरी राहिले आहेत ही वार्ता पडली.२. तेव्हा तो विनीत ब्राह्मण गाणगापूरला आला आणि परमश्रेष्ठ सद्गुरूंना पाहून दंडवत घालून भावभराने त्यांचे पाय धरून स्तुती करू लागला.’३. ‘परमात्मस्वरूपी सद्गुरो, आपण सूर्यादि तेजोमयांचेही प्रकाशक आहा. भक्तांचे स्वामी श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराज, आपले वेदांनी ध्याइलेले पाय सर्व तीर्थांना आश्रयभूत आहेत.४.

**न मर्त्यस्त्वं महेशोऽसि त्र्य्यात्मा मानवाकृतिः । प्राणदानक्षमाम्ब्वाढ्य-कमण्डलुकरोऽसि कः ।।५।।**
**दुष्टनिग्रहसद्रक्षा-क्षमदण्डकरोऽस्यजः । शिवोऽसि मुक्तिदः पाप-तापनाशक्षमोग्रदृक् ।।६।।**
**मृतो जीवितो येन दुग्धा लुलायी वशा शुष्ककाष्ठं तरुत्वं प्रणीतम् ।**
**क्षणादन्त्यजोऽप्युद्धृतस्तेऽनुभावं क्षितौ कोऽर्हति ज्ञातुमन्यत्तवापि ।।७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**स्तुत्यानयास्मि ते विप्र भृशं तोषमुपागतः । भूयात्ते वंशमात्रस्य श्रद्धाभक्तिर्मयि ध्रुवा ।।८।।**

त्वं मर्त्यः न। त्रयी+आत्मा मानव+आकृति महेशः असि। प्राण+दान+क्षम+अम्ब+आढ्य+कमण्डलु+करः कः असि।५। दुष्ट+निग्रह+सत्+रक्षा+क्षम+दण्ड+करः अजः असि। मुक्तिदः पाप+ताप+नाश+क्षम+उग्र+दृक् शिवः असि।६। 'येन मृतः जीवितः, वशा लुलायी दुग्धा, शुष्क+काष्ठं तरुत्वं प्रणीतं, अन्त्यजः अपि क्षणात् उद्धृतः, ते अनुभावं क्षितौ कः अपि ज्ञातुं अर्हति?'।७। श्रीगुरुः उवाच। '(हे) विप्र, अनया स्तुत्या भृशं तोषं उपागतः अस्मि। ते वंशमात्रस्य मयि ध्रुवा श्रद्धाभक्तिः भूयात्।८।

आपण मर्त्य मानव नाहीत तर मानवाचे रूप घेतलेले त्रयमूर्ती महेश आहात. प्राणदानाचे सामर्थ्य असलेल्या जलाने भरलेले कमंडलू हाती धरलेले ब्रह्मदेव (**कः**) आपण आहा.'५. दुष्टांचा निग्रह आणि सज्जनांचे रक्षण करण्याची क्षमता असलेला दंड धारण केलेले भगवान् विष्णू आपणच आहात. पाप आणि ताप यांचा नाश करण्याची शक्ती असलेल्या उग्र दृष्टीचे मुक्तिदायक भगवान शंकर आपण आहा.६. 'ज्यांनी मृताचेही संजीवन केले, वांझ महिषी दुभविली, वाळल्या काष्ठाचा बहरलेला वृक्ष केला, क्षणभरांत अंत्यजाचाही उद्धार केला, त्या आपले सामर्थ्य ह्या भूतलावर कोण जाणण्याजोगा आहे?'७. श्रीगुरू म्हणाले, 'ब्राह्मणा, ह्या तुझ्या स्तुतीने मी खूप प्रसन्न झालो आहे. तुझ्या वंशांतील सर्वांची माझ्यावर स्थिर श्रद्धा आणि भक्ती राहील.८.

**कच्चित्क्षेमं युवत्यादेस् तव ब्रूहि क्व तिष्ठसि । कालेन बहुना विप्र संगतोऽस्यद्य मत्प्रिय ।।९।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ भगवन्त्वत्प्रसादतः । सर्वेषां क्षेममस्तीश काञ्च्यां तिष्ठाम्यहं स्वकैः ।।१०।।**
**योगक्षेमेक्षका भ्रातृ-पुत्रा मे तेऽनुकम्पया । त्वत्पादाब्जरसं पातुमलिप्रायोऽस्मि सम्प्रति ।।११।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कष्टं मे सेवनं नाज्ञ कोऽपि ज्ञातुं न शक्यते । ग्रामे नदीतटेऽरण्ये दुर्गमेऽपि वसाम्यहम् ।।१२।।**

तव युवत्यादेः कच्चित् क्षेमं (अस्ति)? क्व तिष्ठसि? ब्रूहि। (हे) विप्र, मत्+प्रिय, बहुना कालेन अद्य संगतः असि।'९। सायंदेव उवाच। '(हे) देवदेव, जगत्+नाथ, भगवन् त्वत्+प्रसादात् सर्वेषां क्षेमं अस्ति। (हे) ईश अहं स्वकैः काञ्च्यां तिष्ठामि।१०। मे भ्रातृ+पुत्राः ते अनुकम्पया योग+क्षेम+ईक्षकाः। सम्प्रति त्वत्+पाद+अब्ज+रसं पातुं अलिप्रायः अस्मि।'११। श्रीगुरुः उवाच (हे) न+अज्ञ , मे सेवनं कष्टं कः अपि ज्ञातुं न शक्यते। अहं ग्रामे, नदी+तटे, अरण्ये, दुर्गमे अपि वसामि।१२।

तुझी पत्नी आणि सर्व कुटुंबीयांचे क्षेमकुशल आहे ना? आणि तू कुठे राहतोस? मला सर्व सांग बरे! माझ्या प्रिय ब्राह्मणा, किती दिवसांनी तू आज भेटतो आहेस?'९. सायंदेव उत्तरला, 'देवाधिदेवा, जगन्नाथा, भगवंता, आपल्या प्रसादाने माझे बंधुवर्ग आणि पुत्र यांचा योगक्षेम चांगला चालला आहे. आत्ता मी आपल्या पदकमलांच्या मकरंदाचे पान करण्यासाठी भ्रमर होऊन आलो आहे.'११. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'माझी सेवा किती कठीण आहे तुला कळत नाही असे नाही. अरे कुणालाही - देवादिकांनाही, ते कळणे शक्य नाही. मी कधी गावात राहतो, तर कधी नदीकिनारी, कधी अरण्यात तर कधी आणखी दुर्गम ठिकाणी!'१२.

**तच्छुत्वा सोऽनुयास्यामि यत्र क्वापीत्थमाददे । तथेत्युक्त्वैकदा शम्भुस् तेनागात्सह संगमम् ।।१३।।**
**निवार्यान्यान्समं तेन स्थित्वाश्वत्थतले निशि । वृष्ट्यै तदादिदेशाब्दमकालेऽपि परीक्षितुम् ।।१४।।**
**गर्जिताब्दो ववर्षारं झञ्झावातसखस्तदा । क्षणप्रभापि मुष्णन्ती दृष्टिमासीदनुक्षणम् ।।१५।।**
**उपर्युपरि वस्त्रैस्तं समन्तात्स प्रकम्पितम् । सहिष्णुः श्रीगुरुं भेज आसारार्तिरणद् द्विजः ।।१६।।**
**यामाभ्यां खण्डितं वर्षं दृष्ट्वोचे तं गुरुः पुरम । गत्वाग्निमानयात्यन्तं क्लिन्नाङ्गे शीतमुत्थितम् ।।१७।।**

तत् श्रुत्वा सः 'यत्र क्व अपि अनुयास्यामि' इत्थं आददे। 'तथा' इति उक्त्वा शम्भुः तेन सह संगमं अगात्।१३। निशि अन्यान् निवार्य तेन समं अश्वत्थ+तले स्थित्वा तदा (तं) परीक्षितुं अकाले अपि अब्दं वृष्ट्यै आदिदेश।१४। तदा झंझावात+सखः गर्जित+अब्दः अरं ववर्ष। क्षणप्रभा अपि अनुक्षणं दृष्टिं मुष्णन्ती आसीत्।१५। सः आसार+आर्ति+रणत्+द्विजः सहिष्णुः उपरि+उपरि वस्त्रैः प्रकम्पितं गुरुं भेजे।१६। वर्षं यामाभ्यां खण्डितं दृष्ट्वा गुरुः तं ऊचे। क्लिन्न+अङ्गे अत्यंतं शीतं उत्थितम्। पुरं गत्वा अग्निं आनय।१७।

त्यावर 'आपण जिथे कुठे जाल तिथे मी आपल्या मागे येईन,' असे त्याने अंगीकारले. 'ठीक आहे,' असे म्हणून श्रीगुरू एकदा त्याच्याबरोबर संगमावर गेले.१३. रात्री इतर सर्वांना पाठवून फक्त सायंदेवालाच ठेवून त्यांनी मेघाला अकालीच वर्षा करण्याचा आदेश दिला.१४. तेव्हा झंझावातासह गरजणारे मेघ धो धो कोसळू लागले. क्षणोक्षणी डोळे दिपवणारी वीजही (**क्षणप्रभा**) चमकू लागली.१५. भिजून चिंब झाालेल्या सायंदेवाचे दात वाजू लागले. ते सर्व सहन करीत त्या ब्राह्मणाने थरथरणाऱ्या श्रीगुरूंच्यावर वस्त्रे धरून त्यांची सेवा केली.१६. दोन प्रहरांनी पाऊस ओसरल्याचे पाहून श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंग चिंब भिजले आहे आणि थंडी फार वाजते आहे. गावात जाऊन विस्तव आण. मात्र जाताना इकडे तिकडे कुठे पाहू नकोस आणि माझे चिंतन करीत जा.'१७.

**कुत्रापीततस्ततोऽपश्यन् याहि मामनुचिन्तयन् । तच्छ्रुत्वागात्स करक-चूर्णिताङ्गोपि शीकरैः ।।१८।।**
**क्लेदितात्माप्यनुध्यायन् चञ्चलातेजसोऽयनम् । प्रविश्य गोपुराद् द्वाःस्थ-दत्तमार्गः पुरं स तु ।।१९।।**
**गृहीतभाजनन्यस्त-वह्निः शीघ्रं न्यवर्तत । ज्ञातुं गुरूक्तिहेतुं स व्यधाद् दृष्टिमितस्ततः ।।२०।।**
**पार्श्वद्वयतलस्थोग्र-सर्पौ दृष्ट्वाऽगमज्जवात् । दृष्ट्वानुयातावपि तौ भीतो दध्यौ हरेः पदम् ।।२१।।**
**तदोच्चैः सङ्गमे वेद-ध्वनिं श्रुत्वा विलोक्य च । द्योतं भ्रान्तो द्रुतं प्राप्य दृष्ट्वैकं स्वगतं द्विजः ।।२२।।**
**कैः कृतोऽयं ध्वनिर्द्योतः क्वेत्यभूच्छङ्कितः स तम् । भीतं प्राह गुरुर्मा भीस्त्वद्गुप्त्यै तौ प्रचोदितौ ।।२३।।**

इतः ततः कुत्र अपि अपश्यन् मां अनुचिन्तयन् याहि। तत् श्रुत्वा करक+चूर्णित+अङ्गः अपि शीकरैः क्लेदित+आत्मा अपि सः चञ्चला+तेजसः अयनं अनुध्यायन् अगात्। गोपुरात् द्वाः+स्थ+दत्त+मार्गः पुरं प्रविश्य तु सः गृहीत+भाजन+न्यस्त+वह्निः शीघ्रं न्यवर्ततत। सः गुरु+उक्ति+हेतुं ज्ञातुं दृष्टिं इतस्ततः व्यधात्।१८-२०। पार्श्व+द्वय+तलस्थ+उग्र+सर्पौ दृष्ट्वा जवात् अगमत्। तौ अपि अनुयातौ दृष्ट्वा भीतः हरेः पदं दध्यौ।२१। तदा सङ्गमे उच्चैः वेदध्वनिं श्रुत्वा द्योतं च विलोक्य भ्रान्तः द्रुतं प्राप्य एकं (गुरुं) दृष्ट्वा द्विजः स्वगतं, 'कैः अयं ध्वनिः कृतः? क्व द्योत?' इति शङ्कितः अभूत्। सः गुरुः तं भीतं प्राह, 'मा भीः। तौ त्वत्+गुप्त्यै प्रचोदितौ'।२२-२३।

ते ऐकून गारांचा मार खात आणि पावसाच्या रिमझिमीत भिजत तो त्या अंधाऱ्या रात्री विजेच्या प्रकाशाने रस्ता निरखीत निघाला.१८. गोपुरात द्वारपालांनी वाट दिल्यावर तो गाणगापुरात प्रवेशला आणि एका भांड्यात विस्तव घेऊन घाईने परतला. येतांना गुरूंनी इकडे तिकडे न पाहायला का सांगितले म्हणून त्याने दोन्ही बाजूंना दृष्टी टाकली.१९-२०. आपल्या दोन्ही बाजूंना दोन भयंकर साप येताना पाहून तो घाबरून पळू लागला. तरीही ते साप आपल्या मागेच येत असलेले पाहून भीतीने तो श्रीगुरूंच्या पायांचे ध्यान करू लागला. तेव्हा त्याला संगमाकडून मोठा वेदध्वनी ऐकायला आला आणि खूप प्रकाशही दिसला. त्वरेने येऊन पाहता त्याला फक्त एकटे श्रीगुरूच दिसले.२१. तो 'हा आवाज कुणी केला आणि प्रकाश कुठला?' अशा विचाराने गोंधळून गेला. त्याला तसा घाबरलेला पाहून श्रीगुरू म्हणाले, 'अरे ते साप तुझ्या रक्षणासाठी पाठविले होते.'२२-२३.

**तदाप्यही गुरुं नत्वा जग्मतुस्तं प्रभुर्द्विजम् । प्राहेदृशी गुरोः सेवा मरुतामपि दुष्करा ।।२४।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भगवन्ननुकम्पाब्धे शरणागतवत्सल । सेवातत्त्वमुपाख्याहि श्रीगुरोस्तारकं परम् ।।२५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**छायौपम्येन संसेव्यो गुरुस्तत्त्वमिदं परम् । प्रार्पयेन्नियतं देहं सार्थं तस्मै परात्मदृक् ।।२६।।**
**सर्वभावेन बुद्ध्वेशं तं भजेत्तत्प्रसादभुक् । तद्ध्यानजीवनस्तत्पत् तीर्थपस्तत्कथारतिः ।।२७।।**

तदा अही अपि गुरुं नत्वा जग्मतुः। प्रभुः तं द्विजं प्राह, 'ईदृशी गुरुसेवा मरुतां अपि दुष्करा।'२४। सायंदेव उवाच। '(हे) भगवन्, अनुकम्पा+अब्धे शरण+आगत+वत्सल, परं तारकं श्रीगुरोः सेवा+तत्त्वं उपाख्याहि।'२५। श्रीगुरुः उवाच। 'गुरुः छाया+औपम्येन संसेव्यः इदं परं तत्त्वम्। पर+आत्म+दृक् तस्मै स+अर्थं देहं प्रार्पयेत्।२६। तं सर्व+भावेन ईशं बुद्ध्वा तत्+प्रसाद+भुक् तत्+ध्यान+जीवनः तत्+पत्+तीर्थ+पः तत्+कथा+रतिः तं भजेत्।'२७।

तेवढ्यात ते सापही श्रीगुरूंना वंदन करून निघून गेले. प्रभू त्या ब्राह्मणाला म्हणाले, 'अशी ही गुरुसेवा देवादिकांनाही दुष्कर आहे. तू तर माणूस आहेस.'२४. तेव्हा सायंदेवाने प्रार्थना केली, 'अहो दयासागर शरणागतवत्सल भगवंता, श्रेष्ठ तरणोपाय असलेले श्रीगुरूंच्या सेवेचे तत्त्व आपण मला समजावून सांगावे.'२५. श्रीगुरूंनी सांगायला आरंभ केला. 'माणसाची सावली जशी उठता, बसता, चालता त्याच्या बरोबर राहते त्याचप्रमाणे निरंतर गुरूंच्या सेवेत राहावे, हेच परम तत्त्व आहे. परमार्थावर दृष्टी ठेवून धनासह तनू त्याना वाहून टाकावी.'२६. सर्व भावांनी त्याला परमेश्वर मानून त्याचा प्रसाद घ्यावा, त्याच्या ध्यानात जीवन वेचावे, त्याच्या पायाचे तीर्थ घ्यावे, त्याच्या कथांतच रमावे आणि त्यालाच भजावे.२७.

**दुःसाध्येऽपि यदादिष्टं कार्ये भक्त्या तदारभेत् । आरब्धं स नयेत्सिद्धिं भीतः कालोऽप्यपैत्यतः ।।२८।।**
**शृणु गौरीशसंवादं ब्राह्मस्त्वष्टाभजद् गुरुम् । विद्यार्थी सर्वभावात्तद् दाढर्यं ज्ञातुं गुरुर्जगौ ।।२९।।**
**वर्षास्वापः पतन्त्यत्र प्रत्यब्जमुटजे त्वतः । रचयैकं गृहं रम्यं सुखदं नूत्नवत्सदा ।।३०।।**
**शिष्यं तदाश्रुत्य यान्तं गुरुस्त्रीः प्राह कञ्चुकम् । देहि मेऽङ्गमितं चित्रं मनोहरमकृत्रिमम् ।।३१।।**
**पुत्रोऽप्याहाङ्घ्रियोग्ये मे पादुके देहि येऽम्भसि । गर्तेऽपि यातुः सुखदे चिन्तितस्थलनायके ।।३२।।**

दुःसाध्ये अपि कार्ये यत् आदिष्टं तत् भक्त्या आरभेत्। सः आरब्धं सिद्धिं नयेत्। अस्मात् भीतः कालः अपि अपैति। अतः(?)।२८। गौरी+ईश+संवादं शृणु। ब्राह्मः त्वष्टा विद्यार्थी गुरुं सर्व+भावात् अभजत्। गुरुः तत् दाढर्यं ज्ञातुं जगौ।२९। 'प्रति+अब्जं वर्षासु उटजे आपः पतन्ति। अतः एकं रम्यं सुखदं सदा नूत्नवत् गृहं रचय।'३०। तदा गुरुस्त्रीः शिष्यं यातं आश्रुत्य प्राह, 'मे अङ्ग+मितं चित्रं मनोहरं अकृत्रिमं कञ्चुकं देहि।'३१। पुत्रः अपि आह, 'मे अङ्घ्रियोग्ये सुखदे चिन्तित+स्थल+नायके पादुके देहि, ये गर्ते अपि यातुः।'३२।

श्रीगुरूंनी जरी एखादे दुष्कर असे कार्य करण्याची आज्ञा केली तरी भक्तीने त्या कामाला लागावे. शिष्याने आरंभिलेले कार्य गुरू सिद्धीला नेतातच. प्रत्यक्ष काळही ह्या गुरुभक्ताला वचकून असतो, त्यामुळे मरणाचीही भीती बाळगू नये.२८. याविषयी एक शिव आणि पार्वती यांच्यांतील संवाद ऐक. ब्रह्मदेवाचा पुत्र त्वष्टा विद्या शिकण्यासाठी म्हणून सर्वभावे गुरूला भजत होता. त्याची भक्ती किती दृढ आहे ह्याची परीक्षा घेण्यासाठी गुरुजी त्याला म्हणाले, 'अरे शिष्या, दर वर्षी पावसाळ्यात आपल्या घरात पाणी गळते. तू एक सुंदर सुखदायक नेहमी नवीन राहील असे नेटके घर बांधून दे.'३०. तेव्हा तो शिष्य कामाला जातो आहे असे ऐकून गुरुपत्नी म्हणाली, 'बाळा, मला एक छानशी, न शिवलेली, कायम माझ्या अंगाला येणारी चोळी करून दे.'३१. गुरुपुत्रानेही आपली मागणी केली. 'मला माझ्या मापाच्या सुखद पादुका करून दे, ज्या खड्ड्यांतूनही जातील आणि मला हव्या त्या ठिकाणी घेऊन जातील.'३२.

**कन्याह कुण्डले दन्ति-दन्तभूतं प्रदेहि मे । लसत्क्रीडागृहं चैक-स्तम्भं पुत्तलिका अपि ।।३३।।**
**सचेतनाः सदा येषु पाकः शैत्यं न यास्यति । अनञ्जनस्पृग्भाण्डानीत्याकर्ण्य स ययौ वनम् ।।३४।।**
**अज्ञोऽस्म्यप्यत्र गुर्वर्थं मर्तव्यमिति तं वने । निर्विण्णमाययौ कश्चिदवधूतो दयार्द्रधीः ।।३५।।**
**व्यपेतभीः प्रहृष्टात्मा गुरुभावनया स तम् । उपसंगृह्य तत्तस्मै शशंस गुरुभाषितम् ।।३६।।**
**तमाश्वास्याब्रवीत्साधुः काशीक्षेत्रे त्वभीष्टदे । सति जाग्रति विश्वेशे किं केषां दुर्लभं वद ।।३७।।**

कन्या आह। मे कुण्डले, दन्ति+दन्त+भूतं लसत् एक+स्तम्भं क्रीडा+गृहं, सचेतनाः पुत्तलिकाः, अन्+अञ्जन+स्पृक् भाण्डान् येषु पाकः शैत्यं न याति, प्रदेहि। इति आकर्ण्य सः वनं ययौ।३३-३४। 'अज्ञः अस्मि। गुरु+अर्थं अत्र मर्तव्यं' इति निर्विण्णं तं कश्चित् दया+आर्द्र+धीः अवधूतः आययौ।३५। व्यपेत+भीः प्रहृष्ट+आत्मा सः तं गुरु+भावनया उपसंगृह्य तस्मै गुरु+भाषितं शशंस।३६। साधुः तं आश्वास्य अब्रवीत्। अभीष्ट+दे काशीक्षेत्रे तु विश्व+ईशे जाग्रति केषां किं दुर्लभम्, वद।३७।

तेवढ्यात गुरुकन्याही त्याला म्हणाली, 'कुंडले, हस्तीदंताचे बनवलेले एकखांबी खेळातले घर, जिवंत पुतळ्या, ज्यांना काजळी लागणार नाही आणि ज्यात स्वयंपाक थंड होणार नाही अशी भांडी, असे सर्व मला दे.' ह्या सर्वांच्या मागण्या ऐकून तो त्या पुरविण्यासाठी वनात गेला.३३-३४. 'मी तर एक अजाण बालक आहे. हे सगळे मी कुठून आणणार? इथे गुरूंच्या कामात जीव द्यावा' अशा विचाराने निराश झाला असता तिथे कुणी दयार्द्र अंतःकरणाचा एक अवधूत आला.३५. त्याला पाहून त्या त्वष्ट्याची भीती गेली आणि त्याचे मन प्रसन्न झाले. त्या अवधूताला 'हे आपले गुरूच आहेत' असे मानून त्याने त्यांचे पाय धरले आणि त्याला आपल्या गुरूंच्या आणि इतरांच्या मागण्या सांगतल्या.३६. त्या साधूंनी त्याला धीर दिला आणि म्हणाले, 'आपल्या अभीष्टाची पूर्ती करणाऱ्या काशीक्षेत्रात विश्वेश्वर सदैव जागत असता कुणाला काय दुर्लभ आहे? सांग.'३७.

**तत्रत्यपुण्यं को वेत्ति तद्वास्युद्वीक्षणादपि । अपैत्यघौघः किं वाच्यं सुखमानन्दकानने ।।३८।।**
**पुमर्थदोऽपि विश्वेशः प्राणिमात्रं मृतं क्षणात् । स तारकोपदेशेन दत्ते मुक्तिमनुक्षणम् ।।३९।।**

**।। शिष्य उवाच ।।**

**क्वास्ते काशी क्व विश्वेशो जाने स्वर्भुवि वा न तत् । प्रार्थये तारकं त्वां मे दर्शयाज्ञोऽस्मि केवलम् ।।४०।।**
**स प्राह त्वां नयाम्यद्य त्वद्योगात् क्षेत्रदर्शनम् । स्यान्मेऽप्ययत्नतो जन्म-साफल्यं यद्यदीक्षणात् ।।४१।।**
**तमादाय ततो योग-गत्या शीघ्रं महामुनिः । काशीं गत्वा क्षेत्रयात्रां यथाक्रममुपादिशत् ।।४२।।**

'तत्रत्यपुण्यं कः वेत्ति? तत्+वासी+उद्वीक्षणात् अपि अघ+ओघः अपैति। आनन्द+कानने सुखं किं वाच्यम्?'३८। 'विश्वेशः पुं+अर्थदः अपि मृतं प्राणि+मात्रं सः तारक+उपदेशेन क्षणात् अनुक्षणं मुक्तिं दत्ते।'३९। शिष्य उवाच। काशी क्व आस्ते? क्व विश्वेशः? तत् स्वः भुवि वा न जाने। त्वां (अहं) प्रार्थये, मे दर्शय, केवलं अज्ञः अस्मि।४०। ततः महा+मुनिः तं आदाय योग+गत्या शीघ्रं काशीं गत्वा यथाक्रमं काशी+यात्रां उपादिशत्।४२।

त्या काशी क्षेत्रात राहणाऱ्यांचे पुण्य कोण जाणू शकेल? काशीवासियांच्या दर्शनानेसुद्धा पापांच्या राशी नष्ट होतात. ज्याचे नावच आनंदकानन आहे त्या काशी क्षेत्रातील सुखाचे काय वर्णन करावे?३८. तिथे विश्वेश्वर पुरुषार्थ तर पुरवतातच, पण तिथे मृत्यू पावणाऱ्या प्रत्येक प्राणीमात्राला सतत तारक मंत्राचा (रामनाम किंवा ॐकार) उपदेश करून मुक्ती देत असतात. तारसार उपनिषदात आणि पुराणातही '*तारकं ब्रह्म व्याचष्टे*' असे वचन आहे.३९. शिष्याने विचारले, 'ही काशी आणि विश्वेश्वर कुठे आहेत. भूमीवरच आहेत की स्वर्गांत मला ठाऊक नाही. महाराज, मी आपल्याला प्रार्थना करतो की आपणच मला दाखवावे. मी अगदी अजाण आहे!'४०. तेव्हां ते महामुनी त्याला घेऊन योगगतीने काशीला गेले आणि त्याला क्रमशः संपूर्ण काशीयात्रेचे निरूपण केले.४२.

**विश्वेशदर्शनं चान्तर् गृहयात्रां यथाक्रमम् । दक्षिणोदङ्मानसाख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात् ॥४३॥**
**स्नानदानार्चनश्राद्ध-युक्तां यात्रां च पाक्षिकीम् । भवानीशो हरिर्धुण्डिर् दण्डपाणिश्च भैरवः ॥४४॥**
**गुहः काशी च गङ्गाद्या देवा लिङ्गानि सर्वशः । इत्यादीनां पूजनं च निवेद्य स्थापनं तथा ॥४५॥**
**स्वनामाङ्कितलिङ्गस्य कथयित्वा यथोक्तवत् । कुरु प्रसीदेद्विश्वेश इत्युक्त्वान्तर्दधे स्वयम् ॥४६॥**
**मद्भावस्य परीक्षायै गुरु रूपान्तरादयम् । प्राप्तः किलेति मत्वा स यथानिर्दिष्टमाचरत् ॥४७॥**

यथा+क्रमं विश्वेश+दर्शनं, अन्तः+गृह+यात्रां च, दक्षिण+उदक्+मानस+आख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात्..।४३। स्नान+दान+अर्चन+ श्राद्ध+युक्तां पाक्षिकीं यात्रां च, भवानी, ईशो, हरिः धुण्डिः दण्डपाणिः च भैरवः,।४४। गुहः काशी च गङ्गा आद्याः देवाः सर्वशः लिङ्गानि इत्यादीनां पूजनं निवेद्य तथा..।४५। स्व+नाम+अङ्कित+लिङ्गस्य स्थापनं कथयित्वा 'यथा+उक्त+वत् कुरु, विश्वेश प्रसीदेत्' इति उक्त्वा स्वयं अन्तर्दधे।४६। सः 'अयं मत्+भावस्य परीक्षायै गुरुः रूपान्तरात् प्राप्तः किल,' इति मत्वा सः यथा+निर्दिष्टं आचरत्।४७।

क्रमशः विश्वेश्वराचे दर्शन, अंतर्गृहयात्रा, दक्षिणमानसयात्रा, उत्तरमानसयात्रा, पञ्चक्रोशीची यात्रा,(४३) स्नान, दान, पूजा, श्राद्ध यांसह शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या यात्रा, भवानी, विश्वेश्वर, विष्णू, धुण्डिराज, दण्डपाणि तसेच भैरव,(४४) गुह, काशी, गंगा इत्यादि देवांच्या आणि सर्व लिंगांची पूजा सांगून स्वतःच्या नावाचे लिंग स्थापन करण्यास सांगून, 'मी जसे सांगितले तसे सर्व कर,' असे बोलून ते महामुनी अंतर्धान पावले.४६. 'हे माझे गुरूच माझ्या भक्तीची परीक्षा घ्यायला रूप पालटून आले' असा मनाशी निश्चय करून त्या त्वष्ट्याने त्याप्रमाणे सर्व यात्रा यथासांग केल्या.४७.

**चरित्वा क्षेत्रयात्रां स लिङ्गं संस्थापयत्तदा । विश्वेशो दर्शयित्वा स्वं रूपं प्रीतोऽब्रवीदिदम् ।।४८।।**
**वत्स वत्स पवित्रोऽसि गुरुभक्त्या विशुद्धया । धन्योऽस्यनुगृहीतोऽसि वृणीष्वाभीप्सितं वरम् ।।४९।।**
**शिष्योऽपि गुरुतत्पत्नी-पुत्रोक्तीस्तं तथाब्रवीत् । कलाविद्यापटुर्भूत्वा ज्ञानविज्ञानवानिह ।।५०।।**
**प्रसार्य क्वापि चातुर्यं लोकख्यातो भविष्यसि । इत्युक्त्वान्तर्दधे विश्वेट् ततः सोऽप्यमाययौ गुरुम् ।।५१।।**
**याचिताखिलवस्तूनि श्रीविश्वेशप्रसादतः । निर्मायादात्कृती तेन गुरुस्तुष्टस्तमब्रवीत् ।।५२।।**

सः क्षेत्रयात्रां चरित्वा लिङ्गं संस्थापयत्। तदा विश्वेशः प्रीतः तं स्वं रूपं दर्शयित्वा इदं अब्रवीत्।४८। 'हे' वत्स, वत्स, विशुद्धया गुरुभक्त्या पवित्रः असि, धन्यः असि, अनुगृहीतः असि, अभीप्सितं वरं वृणीष्व।४९। शिष्यः अपि गुरु+तत्+पत्नी+पुत्र+उक्तीः तथा अब्रवीत्। 'इह कला+विद्या+पटुः, ज्ञान+विज्ञान+वान् भूत्वा,।५०। क्व अपि चातुर्यं प्रसार्य, लोकख्यातः भविष्यसि' इति उक्त्वा विश्वेट् अन्तर्दधे। ततः सः अपि गुरुं आययौ।५१। कृती श्रीविश्वेश+प्रसादतः याचित+अखिल+वस्तूनि निर्माय अदात्। तेन तुष्टः गुरुः तं अब्रवीत्।५२।

संपूर्ण क्षेत्रयात्रा करून झाल्यावर त्याने आपल्या नावाने शिवलिंगाची स्थापना केली. तेव्हा प्रत्यक्ष विश्वेश्वर प्रसन्न होऊन त्याच्यापुढे प्रकटले आणि म्हणाले,(४८) 'बाळा रे बाळा! अत्यंत शुद्ध गुरुभक्तीने तू पवित्र झाला आहेस, तू धन्य आहेस. तुझ्यावर माझा अनुग्रह आहे. तुला हवा असलेला वर तू मागून घे.'४९. शिष्यानेही त्यांना आपले गुरू, त्यांची पत्नी, पुत्र आणि कन्या यांच्या मागण्या निवेदन केल्या. तेव्हा भगवान विश्वनाथ म्हणाले, 'तू चौसष्ट कला, चौदा विद्या यात प्रवीण होशील. लौकिक आणि पारमार्थिक ज्ञानाने संपन्न होशील. भूलोकातच काय पण कुठेही स्वर्गात वा पाताळातही तू तुझ्या चातुर्याचा प्रभाव पसरवशील. तू सर्व लोकांत प्रसिद्ध होशील.' एवढे बोलून भगवान अदृश्य झाले. तो शिष्य गुरूंच्या घरी परतला.५०. अशा कृतकृत्य झालेल्या शिष्याने काशीविश्वेश्वराच्या प्रसादाने त्यांच्या सर्व मागण्यांप्रमाणे वस्तू निर्माण करून त्यांना अर्पण केल्या. त्यामुळे प्रसन्न झालेले गुरू त्याला म्हणाले.५२.

**भूत्वा ज्योतींषि यावत्त्वं चिरजीवी प्रसार्य सत् । चातुर्यं सर्वलोकेषु त्वं स्रष्टेवापरो भव ।।५३।।**
**तव सर्वर्धिनिधयो वशाश्चिंताव्यथादिकाः । न स्पृशन्ति कदापि त्वां प्रसादोऽयं मम ध्रुवः ।।५४।।**
**ततः प्रस्थापयामास तं स्वस्थानमुपेत्य सः । भूत्वा गुरूक्तवद्धयास्ते श्रीमंस्त्वष्टाखिलश्रुतः ।।५५।।**
**इति गौर्यै शिवेनोक्तं सेवातत्त्वं त्विदं गुरोः । तदुक्ताचरणं भक्त्या सर्वभावात्तदर्चनम् ।।५६।।**
**एतावदुक्त्वा विरते गुरौ द्विजो नत्वाब्रवीदद्य विचित्रमीक्षितम् ।**
**काशीपुरं वै भवता सहाखिलं यद्यत्समाख्यातमवेक्षितं समम् ।।५७।।**

'यावत् ज्योतींषि चिरजीवी त्वं सर्व+लोकेषु चातुर्यं प्रसार्य सत् त्वं अपरः स्रष्टा एव भव।५३। तव सर्व+ऋद्धि+निधयः वशाः। चिंता+व्यथा+आदिकाः त्वां कदा अपि न स्पृशन्ति। अयं मम ध्रुवः प्रसादः।५४। ततः तं प्रस्थापयामास। सः स्व+स्थानं उपेत्य गुरु+उक्तवत् भूत्वा श्रीमन् त्वष्टा अखिलश्रुतः आस्ते।'५५। इति गौर्ये शिवेन उक्तं इदं गुरोः सेवा+तत्त्वं तु तत्+उक्त+आचरणं, भक्त्या सर्व+भावात् तत् अर्चनम्।५६। एतावत् उक्त्वा गुरौ विरते द्विजः नत्वा अब्रवीत्। 'अद्य विचित्रं ईक्षितम्। भवता सह अखिलं काशीपुरं, यत् यत् समाख्यातं समं अवेक्षितम्।५७।

'तू आचंद्रसूर्य चिरंजीव होशील. त्रैलोक्यात आपल्या कौशल्याची छाप टाकून तू प्रतिब्रह्मदेवच होशील.५३. सर्व ऋद्धी, सिद्धी आणि निधी तुला वश होतील. चिंता, व्यथा आदि तुला शिवणारही नाहीत. हा माझा तुला शाश्वत प्रसाद आहे.'५४. असे बोलून गुरूंनी त्याला निरोप दिला. आपल्या स्थानी येऊन तो गुरूंच्या आशीर्वादाप्रमाणे सर्व सिद्धी पावला. त्वष्टा आजही श्रीमान् आणि सर्व लोकांत प्रख्यात आहे.५५. पार्वतीमातेला शंकरांनी सांगितलेले गुरुसेवेचे तत्त्व हेच आहे की, त्यांच्या वचनाचे पालन करून भक्तीभावाने सर्व प्रकारे त्यांचे पूजन करावे.५६. एवढे सांगून श्रीगुरू शांत राहिले. तेव्हा सायंदेव वंदन करून त्यांना म्हणाला, 'आज मी चमत्कार पाहिला! आपल्यासह मी सगळी काशी पाहिली. आपण जे जे सांगत होता ते ते सर्व मी प्रत्यक्ष पाहिले. खरोखर, कुठे काशी, कुठे मी आणि तसेच कुठे आपण? सर्व कांही पूर्वी न पाहिलेले आपण मला दाखविले!५७.

**क्वाहं क्व काशी क्व भवांस्तथापि वा अदृष्टपूर्वं सकलं प्रदर्शितम् ।**
**न त्वं नरो नासि सुरो न चेतरो नूनं परात्मैव परावरोऽस्यजः ।।५८।।**
**प्राग्ब्रह्म त्वमजोऽक्रियोऽपि बहुलं स्यामित्यभूद्धीस्तया । सृष्ट्वैवाण्डभुवं ततो जगदिदं सृष्टं सधर्मं गुणैः ।।**
**स्वैः स्वं भो रमयन्विहंसि सदरीनत्रावतीर्यानिशं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।५९।।**

क्व अहं? क्व काशी? क्व भवान् तथा अपि वा? सकलं अदृष्टपूर्वं प्रदर्शितम्! त्वं न नरः, न सुरः न च इतरः असि। नूनं पर+अवरः अजः परात्मा एव असि।'५८। प्राक् त्वं ब्रह्म अजः अक्रियः अपि बहुलं स्याम् इति धीः अभूत्। तया अण्ड+भुवं सृष्ट्वा ततः स्वैः गुणैः इदं जगत् सधर्मं सृष्टम्। स्वं रमयन् अत्र अवतीर्य अनिशं सत्+अरीन् विहंसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्री+पद+अब्ज+द्वयं वन्दे।५९।

आपण ना मनुष्य आहात, ना देव, ना आणखी कुणी! आपण ब्रह्मादिकांहून श्रेष्ठ आहात. जन्मादिविकाररहित साक्षात् परमात्माच आपण आहांत!'५८. असे बोलून त्या सायंदेवाने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. हे शार्दूलविक्रीडित वृत्तांतील अष्टक आहे. जगाची उत्पत्ती होण्यापूर्वी नित्य, शुद्ध, बुद्ध ह्या लक्षणांनी जाणले जाणारे ब्रह्म अविकारी आणि निष्क्रिय होते. त्याचा 'मी एक आहे तो बहुल (अनेक) व्हावा,' असा संकल्प झाला. आत्मा एकमेवाद्वितीय आहे. त्याला बहुलत्व कसे येणार? आत्म्यावेगळी अशी कोणतीच वस्तू असूच शकत नाही. आत्म्याचे अनेकत्व हे आकाशाच्या अनेकत्वा प्रमाणे जाणावे. आकाश एकच आहे. पण घट, मठ आदींना व्यापून ते घटाकाश, मठाकाश, महदाकाश अशा नावांनी ओळखले जाते. म्हणजे त्याचे अनेकत्व वस्तुसापेक्ष आहे. तसेच आत्म्याचे अनेकत्वही वस्तुसापेक्षच आहे. सृष्टीतील सर्व पदार्थ सर्व अवस्थात ब्रह्मात्मकच असतात. ब्रह्मावाचून कोणत्याही वस्तूला अस्तित्व असूच शकत नाही. ब्रह्म मात्र त्या वस्तूच्या पलीकडे असते.

अनेक होण्याचा संकल्प म्हणजेच मूळमाया किंवा प्रकृती. तिच्याद्वाराच ब्रह्मदेव झाले आणि त्यांच्यापासून हे आपल्या गुणधर्मासहित जगत् उद्भवले. हे सद्गुरो, आपल्या स्वरूपापासूनच आपण कल्पिलेल्या ह्या मायामय त्रिगुणात्मक पाचभौतिक सृष्टीत अवतरून (मायेचा स्वेच्छेने अंगीकार करून) आपण सतत दुष्टांचे निर्दालन करता.

**कल्याकृष्टहृदुझ्झितक्रतुनर-त्रस्ताध्वराशीर्मुदे । प्रातः सूर्य इवोदितोऽस्यज महामोहान्धकारं ग्रसन् ।।**
**सद्धर्माश्रमसेतुमत्र शिथिलप्रायं सुदार्ढ्यं नयन् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६०।।**
**सर्वानन्दनिधानरूपममलं स त्वं सुखं मूर्तिमत् । प्रादुष्कृत्य जनत्रयान्तरमृग-क्रीडावनं पावनम् ।।**
**संसारावटमग्नमुद्धरसि भो स्वीकृत्य तुर्याश्रमम् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६१।।**

कलि+आकृष्ट+हृत्+उझ्झित+क्रतु+नर+त्रस्त अध्वर+आशीः मुदे, (हे) अज, मोह+अन्धकारं ग्रसन् प्रातः सूर्य इव उदितः असि। अत्र शिथिल+प्रायं सत्+धर्म+आश्रम+सेतुं सुदार्ढ्यं नयन् (वर्तसे)। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६०। (भो) सर्व+आनन्द+निधान, स त्वं मूर्तिमत् सुखं जन+त्रय+अन्तर+मृग+क्रीडा+वनं पावनं प्रादुष्कृत्य तुर्याश्रमं स्वीकृत्य संसार+अवट+मग्नं उद्धरसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६१।

हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. या अष्टकाची टीका लिहिताना प्रत्येक श्लोकाच्या टीकेनंतर त्याचा भावार्थ दर्शविणारा एक सुगम अनुष्टुभ् श्लोक दिला आहे. *बहु स्यामिति संकल्प्य स आद्योऽभूज्जगत्स्वयं। श्रीदत्तः शिक्षयन्दुष्टान्रमते स्वात्मना स्वयं।।१।।*५९.

अधर्माचा मित्र असलेल्या कलीकडे चित्त आकर्षिल्यामुळे मनुष्यांनी यज्ञ (विहित कर्म आणि उपासना) टाकल्याने त्रस्त झालेल्या देवतांच्या संतोषासाठी, तसेच मूल अज्ञानरूपी महामोहाचा अंधार (तम) नष्ट करण्यासाठी, आपण प्रातःकाळच्या सूर्यासारखे प्रकट झाला आहात. वर्णाश्रमधर्माची विस्कटलेली घडी बसविण्यासाठी अवतरलेल्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *नरैस्त्यक्तेषु यागेषु कलिदोषहतैरिह। देवानन्दप्रदो दत्तोऽवतीर्णो धर्मभावनः।।२।।*६०. सर्व परमानन्दाचे आगर, सुखाची गाळीव मूर्ती, मुक्त, मुमुक्षू आणि बद्ध अशा त्रिविध जनांच्या मानसरूपी मृगांचे क्रीडावन असलेले संन्यासाश्रमाश्रित पावन रूप धरून संसारगर्तेत बुडणाऱ्या जीवांचा उद्धार करणाऱ्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *सर्वानन्दनिधिर्भूत्वा यतिर्दत्तो जगत्त्रयं। पावयन्नमलो भक्तानुद्धरत्यतिकष्टतः।।३।।*६१.

**मूके गां दृशमन्धके सुतनयं वन्ध्यासु चासून्मृते । सौभाग्यं विधवासु पल्लवमहो दत्तं सुशुष्केन्धने ।।**
**एवंभूत इयान्तवैष महिमा त्रैलोक्यसंस्थाक्षमो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६२।।**
**मुक्तावास मुमुक्षुकल्पविटपिन् भो कामिनां कामधुग् । दारिद्रानलमेघ दुष्कृतदवाग्रे तापिताराम ते ।।**
**श्रुत्यन्विष्टरजःपदं श्रुतविवादातीततत्त्वं महत् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६३।।**

मूके गां, अन्धके दृशं, वन्ध्यासु सुतनयं, मृते असून्, विधवासु सौभाग्यं, सशुष्क+इन्धने पल्लवं दत्तम्। एवंभूत इयान् तव एष त्रैलोक्य+संस्था+क्षमः महिमा। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वर श्रीपद+अब्ज+द्वयं वन्दे।६२। भो मुक्त+आवास, मुमुक्ष+कल्प+विटपिन्, कामिनां काम+धुक्, दारिद्र+अनल+मेघ, दुष्कृत+दव+अग्रे, तापित+आराम, ते श्रुति+अन्विष्ट+रजःपदं श्रुत+विवाद+अतीत+तत्त्वं महत्। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६३।

मुक्याला वाचा, आंधळ्याला दृष्टी, वंध्येला सुपुत्र, प्रेताला प्राण, शुष्क लाकडाला पालवी देणारे आपले सामर्थ्य तर आहेच; पण त्रैलोक्याचीही स्थापना करणे आपल्याला खेळ आहे. (**अक्षम**ः म्हणजे अधिक सक्षम असा अर्थ टीकेत दिला आहे.) हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *मूकाय वाचं दृशमन्धकाय ददौ वशायै तनयं मृताय। प्राणान्सुभागं च गताधवायै शुष्कद्रुमं पल्लवयन्हि दत्तः।।४।।*६२. वर *त्रिविधजनक्रीडावन* असे म्हटले त्याचे अधिक स्पष्टीकरण या श्लोकात आहे. '*निर्दोषं हि परं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः*' या भगवद्वचनानुसार (५:१९) आपण मुक्तांचे निवास्थान आहांत. मुमुक्षूंना सद्गुरुप्राप्ती, साधनमार्ग, चित्तशुद्धी, अंतरायांचा निरास, मोक्षप्राप्तीची साधने इत्यादि पुरविणारे कल्पवृक्ष आपण आहात. बहिर्मुख भक्ताच्या कामना पुरविणारी कामधेनूही आपणच आहात. दारिद्र्यरूपी अग्नीचे शामक मेघ आपणच आहात. पातकांचे वन जाळणारे दावाग्नी आपणच आहात. संसाराच्या तापांनी पोळलेल्या जीवांचा आरामही आपणच आहात. वेदही आपल्या चरणधूलीचा मागोवा घेत आहेत. मात्र आपले व्यापक पद शास्त्रांच्या विवादापलीकडे आहे. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *चिंतामणिरिवाभाति भक्तानां भक्तियोगतः। शाास्त्रवादव्यतीतात्मा श्रीदत्तो भगवान्स्वयं।।५।।*६३.

**भो योगीश्वरभावितं तव पदं तीर्थाश्रयं सज्जना- । जीवं कामिसुदैवतं च कमलालीलास्थलं निर्मलम् ।।**
**विद्वद्वादकरण्डकं सुकृतसंस्थानं महत्पावनं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६४।।**
**वेदागोचर ते चरित्रममलं शक्तोऽत्र कः कृत्स्नशो । वक्तुं वह्न्यबिनेन्दुभूखपवनात्मेतीह मूर्त्यष्टकम् ।।**
**एतद्विश्वमयं न चान्यदिह वा ॐकाररूपेशितर्- । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६५।।**

भो, तव पदं योगि+ईश्वर+भावितं, तीर्थ+आश्रयं, सज्जन+आजीवं, कामि+सुदैवतं, कमला+लीला+स्थलं, निर्मलं, विद्वत्+वाद+करण्डकं, सुकृत+संस्थानं, महत् पावनं (अस्ति)। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६४। (हे) वेद+अगोचर, अत्र ते अमलं चरित्रं कृत्स्नशः वक्तुं कः शक्तः? हे ॐकार+रूप ईशितः वह्नि+अप्+इन+इन्दु+भू+ख+पवन+आत्मा इति इह मूर्ति+अष्टकं एतत् अयं विश्वम्। न च अन्यत् वै। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे।६५।

ते पद अनेकांच्या बुद्धीचा विषय कसे झाले आहे ते सांगतात. याज्ञवल्क्यादि योगीश्वरांनी चिंतिलेले आपले पद आहे. गंगादि तीर्थांचा आपण आश्रय. गंगा तर आपल्याच चरणापासून निःसृत झाली आहे. नारायणोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार आपल्या चरणांनी पवित्र झालेली तीर्थे महापाप्यांनासुद्धा तारतात. संतसज्जनांना तर आपले पद जीविकाभूत आहे. कामी जनांचे ते उत्तम दैवत आहे. लक्ष्मीचे ते विलासस्थान आहे. पापहारी आपले महान् पद विद्वानांच्या वादरूपी रत्नांची मंजूषा आहे. पुण्यार्जनाचे ते क्षेत्र आहे. *योगीचिंतितं लोकपावनं यत्पदं महत्। कामदं श्रीनिवासं च स दत्तः पुण्यशास्त्रभूः।।६।।*६४. (उपनिषदांव्यतिरिक्त) वेदांनाही अगम्य असणाऱ्या आपल्या पावक चरित्राचे वर्णन संपूर्णतया करण्याचे कुणाचे सामर्थ्य आहे? हे ॐकारस्वरूप ईश्वरा, अग्नी, जल, सूर्य, चंद्र, भूमी, आकाश, वायू आणि जीवात्मा ह्या आपल्या अष्टमूर्तींचेच हे जग बनलेले आहे. ह्या अष्टकाव्यतिरिक्त वेगळे असे इथे कुठेच कांहीच नाही. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *आत्माप्युपनिषद्वेद्यो यल्लीलां कोऽपि वेद नो। जगन्मयाष्टमूर्त्यात्मा स दत्तः प्रभवात्मकः।।७।।*६५.

**कुण्डीदण्डकरं प्रशान्तममलं संन्यासिरूपं तव । श्रीभीमामरजायुतिस्थितमज ध्येयं शरण्यं मयि ।।**
**ज्ञानं तारकमीश सत्यमनिशं ब्रह्मन्स्थिरीकुर्वदो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६६।।**
**एवं स्तुवन्तं प्रभुराह तेऽर्पिता । तुष्टेन भक्तिर्मयि खल्वहैतुकी ।**
**भो पुत्रपौत्रादिसमस्तवंशजा । भक्ता भविष्यन्ति ममैव निश्चितम् ।।६७।।**
**इतःपरं म्लेच्छनिषेवणं जहि । स्त्रिया सुतैश्चात्र सदैव तिष्ठ भोः ।**
**द्विजोऽपि गत्वा गृहमानयत्स्त्रियं । सुतांश्च तुष्टाव जगद्गुरुं पुनः ।।६८।।**

(हे) अज, ईश, तव अदः कुण्डी+दण्ड+करं प्रशान्तं अमलं श्रीभीमा+अमरजा+स्थितं ध्येयं, शरण्यं, ज्ञानं, तारकं, सत्यं मयि अनिशं स्थिरीकुरु। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे ।६६। एवं स्तुवन्तं प्रभुः आह, 'भो, (मया) तुष्टेन त्वयि अहैतुकी भक्तिः अर्पिता खलु। पुत्र+पौत्र+आदि समस्त+वंशजाः निश्चितं मम एव भक्ताः भविष्यन्ति।६७। इतः परं म्लेच्छ+निषेवणं जहि। भोः स्त्रिया सुतैः च अत्र एव सदैव तिष्ठ।' द्विजः अपि गृहं गत्वा स्त्रियं सुतान् च आनयत् पुनः जगत्+गुरुं तुष्टाव।६८।

परब्रह्मस्वरूप ईश्वरा, आपले दंड आणि कमंडलू धारण केलेले, ध्यानयोग्य, शरण्य, प्रशांत, ज्ञानमय भीमा-अमरजासंगमनिवासी यतिरूप नित्य माझ्या हृदयांत स्थिर करा. *संन्यासिरूपो श्रीदत्तो धृतदण्डकमण्डलुः। गन्धर्वस्थः सच्चिदात्मा सदा तिष्ठतु मे हृदि।।८।।*६६.

अशा प्रकारे स्तवन करणाऱ्या सांयदेवाला श्रीगुरू म्हणाले, 'सायंदेवा! मी तुझ्यावर प्रसन्न होऊन तुला निर्हेतुक (*मोक्षैकफला*) भक्ती प्रदान केली आहे. तुझे पुत्र, नातू आदि सर्व वंशज माझेच भक्त होतील.६७. यापुढे तू यवनांची चाकरी सोडून दे. तुझ्या बायकामुलांना घेऊन येऊन तू इथे गाणगापुरातच कायम राहा.' सायंदेवही कडगंचीला जाऊन आपल्या कुटुंबियांना घेऊन आला आणि पुनः त्याने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'हे ईश्वरा ! वाच्य (रूप) आणि वाचक (नाम) या नात्याने तू जगताला व्यापले आहेस.

**त्वं वाच्यवाचकतयेश जगन्मयो वा । ॐकारवाच्य भगवन् त्रिगुणात्मकोऽसि ।**
**आद्यन्तवर्जित पुराकृतभागधेयाद् । दृष्टं त्विदन्तव परात्परसत्त्वरूपम् ।।६९।।**
**पापोऽपि पूतोऽस्मि तवाङ्घ्रिसंश्रयात् । स्पर्शाश्रयाल्लोहमपीव काञ्चनम् ।**
**तप्तोऽपि शान्तोऽस्मि मुखेन्दुदर्शनाद् । दीनोऽपि धन्योऽस्मि तव प्रसादतः ।।७०।।**

'(हे) वाच्य+वाचकतया ईशः जगत्+मयः (हे) ॐकारवाच्य भगवन् त्रिगुण+आत्मकः असि। (हे) आदि+अन्त+वर्जित, पुरा+कृत+भागधेयात् इदं तव परात्पर+सत्त्व+रूपं दृष्टम्।६९। (अहं) पापः अपि तव अङ्घ्रि+संश्रयात् स्पर्श+आश्रयात् लोहं अपि काञ्चनं इव, पूतः अस्मि। मुख+इन्दु+दर्शनात् तप्तः अपि शान्तः अस्मि। दीनः अपि तव प्रसादतः धन्यः अस्मि।'७०।

पतंजलींच्या सूत्रानुसार (१:२७) ॐकार ज्याचे वाचक आहे अशा भगवंता, आपण त्रिगुणांचे ईश्वर आहां.' 'हेच एक अक्षर ब्रह्म आहे,' (कठ उ. १:२:१६) 'हेच श्रेष्ठ आलंबन आहे,' (१:२:१७), 'पर आणि अपर ब्रह्म म्हणजेच ॐकार' (प्रश्न उ. ५:२) इत्यादि श्रुतींनी वाच्य ब्रह्म आणि त्याचा वाचक ॐकार यांची एकरूपता प्रतिपादलेली आहे. त्याकरिता सायंदेव श्रीगुरूंना जगन्मय म्हणत आहे. नाम आणि नामी यांच्यांत भेद नसल्याने तसेच ॐकार हा ब्रह्माचा विर्वत आहे आणि ब्रह्म ॐकाराचे अधिष्ठान आहे. सांयदेव पुढे म्हणतात, 'आदि आणि अंत रहित देवा, माझ्या पूर्वपुण्याईने आपल्या ह्या श्रेष्ठातिश्रेष्ठ सत्त्वस्थ रूपाचे मला दर्शन होत आहे.६९. मी पापी असलो तरी, परीसाला लागून लोखंडाचेही सोने व्हावे तसा आपल्या चरणस्पर्शांने मी पवित्र झालो आहे. त्रिविध तापांनी पोळलेला असूनही आपल्या मुखचंद्राच्या दर्शनाने मी शांत झालो आहे. दीन असूनही मी आपल्या कृपाप्रसादाने धन्य झालो आहे.'७०.

**स्तुत्वैवं श्रीगुरुं हृष्टः कारनाटकभाषया । आवतारकथोद्धातं जगौ तस्य यथाक्रमम् ।।७१।।**
**भगवान्तेन तुष्टः सन् दत्वेष्टं वरमाह तम् । अयं ज्येष्ठसुतो मान्यो धन्यस्ते मेऽतिवल्लभः।।७२।।**
**इत्युक्त्वा नागनाथस्य मूर्ध्न्यधाच्छंकरं करम् । तदैव गीष्पतिसमो वक्ता ज्ञाता बभूव सः ।।७३।।**
**सद्गुरुः प्राह विप्रं ते भार्येयं सुभगा सती । चतुरश्चतुरान्पुत्रान् लभेत्त्वमपि भाग्यभाक् ।।७४।।**
**इतः परं म्लेच्छलब्ध-वृत्तिं हित्वा कुटुम्बयुक् । तिष्ठात्रैव तव श्रेयो भवेन्मे सुप्रसादतः ।।७५।।**
**स्नात्वा स्वकैः सह तिथौ भाद्रशुद्धचतुर्दशे । अनन्तव्रतमस्त्यद्य तारकं तत्त्वमाचर ।।७६।।**

एवं श्रीगुरुं स्तुत्वा हृष्टः कारनाटक+भाषया तस्य आवतार+कथा+उद्धातं यथा+क्रमं जगौ।७१। भगवान् तेन तुष्टः सन् तं इष्टं वरं दत्वा आह। 'अयं ज्येष्ठसुतः मान्यः धन्यः मे अतिवल्लभः।'७२। इति उक्त्वा नागनाथस्य मूर्ध्नि शंकरं करं अधात्। सः तदा एव गीष्पतिसमः वक्ता ज्ञाता बभूव।७३। सद्गुरुः विप्रं प्राह, 'इयं ते सुभगा सती भार्या चतुरः चतुरान् पुत्रान् लभेत्। त्वं अपि भाग्यभाक्।७४। इतः म्लेच्छ+लब्धवृत्तिं हित्वा कुटुम्ब+युक् अत्र एव तिष्ठ। मे सुप्रसादतः तव श्रेयः भवेत्।७५। स्वकैः स्नात्वा अद्य भाद्रशुद्धचतुर्दशे तिथौ तारकं अनन्तव्रतं अस्ति, तत् त्वं आचर।'७६।

अशा रीतीने श्रीगुरूंची स्तुती करून हर्षोत्फुल्ल चित्ताने सायंदेवाने श्रीगुरूंच्या अवतारांतील लीला कर्नाटक भाषेत क्रमशः गायल्या.७१. सायंदेव वेदज्ञ ब्राह्मण असूनही वेदांतील सूक्ते किंवा पुराणातील स्तोत्रे यांनी स्तुती न करता त्याने कानडी भाषेचा का उपयोग केला? आणि देवालाही ते कसे आवडले असे कुणी म्हणेल. **पूजादि विधीत वैदिक मंत्रांची अपेक्षा आहे. ईश्वरस्तवन मात्र आपापल्या अधिकारानुसार करावे.** त्याला कांही प्रत्यवाय नाही. उलट ईश्वराची प्रसन्नताच लाभते. कारण ईश्वराला प्रेमाची आवड असते. तो भक्तीनेच प्रसन्न होतो.

श्रीगुरू भगवान् प्रसन्न झाले आणि सायंदेवाला इष्ट वर देऊन म्हणाले, 'हा तुझा वडील मुलगा धन्य आहे. तो सर्वमान्य होईल. हा मला अतिशय प्रिय आहे.'७२. असे म्हणून त्यांनी त्या नागनाथाच्या मस्तकावर हात ठेवला. तो तत्क्षणीच बृहस्पतीसमान वक्ता आणि ज्ञाता झाला.७३.

**धर्मः कृष्णोपदेशेन चरित्वा यद्व्रतं महत् । दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वागात्सतनुर्दिवम् ।।७७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भवान्देवोऽस्ति नोऽनन्तो भवत्सेवाव्रतं परम् । तथापि श्रोतुमिच्छामि को धर्मः कीदृशं व्रतम् ।।७८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धर्मोऽभूत्पाण्डवो राजा तत्सदस्यां सुयोधनः । मायाभ्रान्त्यापतन्मानी व्रीडितो जनहास्यतः ।।७९।।**

'धर्मः यत् महत् व्रतं कृष्ण+उपदेशेन चरित्वा दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वा सतनुः दिवं अगात्।'७७। सायंदेव उवाच। 'भवान् नः देवः अस्ति। भवत्+सेवा परं व्रतं (चि अस्ति)। तथापि (अहं) कः धर्मः, कीदृशं व्रतं, श्रोतुं इच्छामि।'७८। श्रीगुरुः उवाच। 'धर्मः पाण्डवः राजा अभूत्। तत् सदस्यां मानी सुयोधनः माया+भ्रान्त्या अपतत्। जन+हास्यतः व्रीडितः।७९।

सद्गुरू सायंदेवाला म्हणाले, 'ही तुझी भाग्यवती आणि पतिव्रता स्त्री चार बुद्धिमान् पुत्रांची आई होईल. तूसुद्धा भाग्यशाली आहेस.७४. यापुढे उपजीवेकेसाठी यवनांची सेवा करू नकोस. तू तुझ्या कुटुंबासह इथे गाणगापुरातच राहा. माझ्या प्रसादाने तुझे कल्याण होईल. ७५.आज भाद्रपद शुद्ध चतुर्दशी आहे. तरी तू आपल्या परिवारासह स्नानादि करून तारक अशा अनंतव्रताचे आचरण कर.'७६. धर्मराजाने श्रीकृष्णाच्या उपदेशाने हे महान् व्रत केले. त्याच्या प्रभावाने दिव्य सौख्याचा आणि सार्वभौम राज्याचा उपभोग घेऊन सदेह स्वर्गाला गेला.७७. सायंदेवांनी विचारले, 'आमचे तर आपणच देव आहात आणि आपली सेवा हेच आमचे परम व्रत आहे. तरीही मला हे जाणण्याची इच्छा आहे की हा धर्मराजा कोण? आणि हे व्रत कसे करतात?'७८. श्रीगुरू उत्तरले, 'धर्म पण्डूचा पुत्र राजा होता. एकदा त्याच्या मयासुराने निर्मिलेल्या सभेत दुर्योधन मायेच्या भुलीने पाण्याला भूमी, भूमीला पाणी, दाराला भिंत आणि भिंतीला दार समजून पडला. तेव्हा झालेला उपहास मानी सुयोधनाच्या जिव्हारी लागला.७९.

**जित्वा द्यूतमिषाद्धर्मं हृततच्छ्रीः स सानुजम् । वनाय प्रेरयत्सोऽपि तत्र गत्वा सुदुःखितः ॥८०॥**
**स एकदागतं कृष्णं नत्वा सस्त्र्यनुजोऽब्रवीत् । त्वन्नस्त्रातेति बिरुदं वहन्नोऽकं न वेत्सि किम् ॥८१॥**

**॥ श्रीकृष्ण उवाच ॥**

**बलवद्दैवमपि मां भजतां नेक्षते सदा । त्वं मद्भक्तोऽपि मद्वाक्यात् कुर्वनन्तव्रतं महत् ॥८२॥**
**कोऽनन्तस्तद्व्रतं कीदृक् पुरा केन कृतं वद । इति धर्मानुयोगं स श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे ॥८३॥**

सः द्यूत+मिषात् धर्मं स+अनुजं जित्वा हृत+तत्+श्रीः वनाय प्रेरयत्। सः अपि तत्र सुदुःखितः।८०। सः एकदा आगतं कृष्णं स+स्त्री+अनुजः नत्वा अब्रवीत्। त्वं नः त्राता इति बिरुदं वहन् नः अकं न वेत्सि किम्?'८१। श्रीकृष्ण उवाच। 'सदा मां भजतां बलवत् दैवं अपि न ईक्षते। (तथा) अपि त्वं मत् भक्तः। मत् वाक्यात् महत् अनन्तव्रतं कुरु।'८२। 'कः अनन्तः? कीदृक् व्रतं?' इति धर्म+अनुयोगं श्रुत्वा सः वक्तुं प्रचक्रमे।८३।

त्याने धर्मराजाला कपटद्यूताने हरवले आणि त्याचे राज्य आणि संपत्ती हिरावून घेऊन त्याला बंधूंसहित बारा वर्षांच्या वनवासाला पाठविले.८०. तेव्हा तिथे वनवासाचे कष्ट भोगणाऱ्या पांडवांना भेटायला श्रीकृष्ण आले असता धर्मराजाने त्याला आपल्या बांधवांसहित नमस्कार केला आणि त्याला विचारले, 'अरे कृष्णा पांडवांचा कैवारी अशी बिरुदावली मिरवतोस; पण तुला आमचे दुःख दिसत नाही का?'८१. श्रीकृष्ण म्हणाले, 'जो निरंतर निर्विकल्प स्थितीत माझ्या भजनात निमग्न असतो त्याच्याकडे दैव कितीही बलवत्तर असले तरी पाहातसुद्धा नाही. कारण दैवाची प्रतिकूलता जाणवण्यासाठी देहतादात्म्य असावे लागते. 'ज्यांचे वासनाजाल निःशेष लय पावले आहे आणि ज्यांच्या पापपुण्यांचा सांठा मुळासह उखडलेला आहे' (पंचदशी १:६१) त्यांच्याकडे दैवाचा दृष्टिक्षेपही होत नाही. अरे, युधिष्ठिरा, तुझी सध्या ती अवस्था नसली तरी तू माझा भक्तच आहेस. तरी तू माझ्या सांगण्यानुसार महान अशा अनंतव्रताचे अनुष्ठान कर.८२. धर्मराजाने विचारले, 'कोण हा अनंत? आणि त्याचे व्रत कसे करावयाचे?' तेव्हा श्रीकृष्णांनी उत्तर दिले.८३.

**चराचरजगत्काल-भूताद्यात्माप्यहं विभुः । कर्मप्रयोजनगुणैर्भूपानन्तोऽस्म्यहं पृथक् ।।८४।।**
**भाद्रशुक्लचतुर्दश्यामनन्तव्रतमुत्तमम् । व्रतिनोऽनन्तफलदं तत्कुर्विष्टमवाप्स्यसि ।।८५।।**
**ऋषिः सुमन्तुः प्रागासीद् वासिष्ठो गौतमीपतिः । तत्स्त्रीः कन्यां प्रसूयैकां मृतान्योद्वाहितामुना ।।८६।।**
**सा दुःशीला कलिद्वेष-प्रिया चण्डी पतिं सुताम् । क्रूरा तौ त्रासयामास कन्यापि ववृधे शुभा ।।८७।।**

'(हे) भूप, अहं विभुः कर्म+प्रयोजन+गुणैः चर+अचर+जगत्+काल+भूत+आदि+आत्मा अपि अहं पृथक् अनन्तः अस्मि।८४। उत्तमं अनन्तव्रतं भाद्र+शुक्ल+चतुर्दश्यां व्रतितं अनन्त+फलदम्। तत् कुरु, इष्टं अवाप्स्यसि।८५। प्राक् सुमन्तुः वासिष्ठः ऋषिः गौतमी+पतिः आसीत्। तत् स्त्रीः एकां कन्यां प्रसूय मृता। अमुना अन्या उद्वाहिता।८६। सा दुःशीला कलि+द्वेष+प्रिया चण्डी क्रूरा तौ पतिं सुतां त्रासयामास। शुभा कन्या अपि ववृधे।८७।

'माझ्या व्यापकत्वाने हे सर्व चराचर जगत्, काल, सर्व जीव इत्यादि मीच झालो आहे. कर्म, प्रयोजन, गुण वगैरेंनी मीच हे सर्व करूनसुद्धा मी वेगळाच आहे. पुरुषसूक्तांत (ऋग्वेद संहिता १०:९०:३) म्हणाल्याप्रमाणे ह्या सर्वापेक्षाही अधिक श्रेष्ठ मी आहे. (*अतो ज्यायाँश्च पुरुषः... पादोऽस्य विश्वा भूतानि*) गीतेतही (१०:४१) माझे प्रतिपादन आह की मी माझ्या एका अंशाने हे सर्व विश्व धारण करून राहिलो आहे (*विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्।*), म्हणूनच काल, देश इत्यादि परिच्छेदरहित अनंत तो मीच आहे.'८४. 'हे उत्तम असे अनंतव्रत भाद्रपद शुक्ल चतुर्दशीला केले असता अनंत फल प्राप्त होते. ते तू कर म्हणजे तुला तुझे इष्ट प्राप्त होईल.'८५. पूर्वी सुमन्तु नावाचे एक वासिष्ठ गोत्रीय ऋषी होते. त्यांच्या पत्नीचे नाव गौतमी असे होते. तिने एका मुलीला जन्म दिला आणि ती कालवश झाली. गृहस्थाश्रमाच्या निर्वाहासाठी त्या ऋषींनी दुसरा विवाह केला.८६. ती दुष्ट, संतापी, भांडकुदळ, आकस धरणारी आणि क्रूर स्वभावाची होती. ती पतीचा आणि कन्येचाही छळ करू लागली. ती सुस्वभावी कन्या मात्र वाढू लागली.८७.

**चित्रक्रियापटुं सोऽदात् सच्छीलगुणलक्षणाम् । कौण्डिण्याय स्वगृह्योक्त-ब्राह्मोद्वाहविधानतः ।।८८।।**
**तत्र श्वशुरवात्सल्यात् स्थित्वा मासद्वयं मुनिः । श्वश्रूत्रस्तो ययौ वध्वा कौण्डिण्यः श्वशुराज्ञया ।।८९।।**
**चण्ड्याररं दृढं बध्वा पाथेयं नार्पितं स तु । प्रादाद्बहिस्थगोधूम-पुलाकं तौ ततो गतौ ।।९०।।**
**मध्याह्ने तस्थतुर्नद्यां चिरण्टीः प्रेक्ष्य तत्र सा । गत्वार्चयन्तीः प्राहेदं युष्माभिः क्रियते किमु ।।९१।।**

सः चित्र+क्रिया+पटुं सत्+शील+गुण+लक्षणां (कन्यां) कौण्डिण्याय स्व+गृह्य+उक्त+विधानतः अदात्।८८। श्वशुर+वात्सल्यात् मुनिः तत्र मास+द्वयं स्थित्वा कोण्डिण्यः श्वश्रू+त्रस्तः वध्वा श्वशुर+आज्ञया ययौ।८९। चण्ड्या अररं दृढं बध्वा पाथेयं न अर्पितम्। सः तु बहिस्थ गोधूम+पुलाकं अदात्। ततः तौ गतौ।९०। मध्य+अह्ने नद्यां तस्थतुः। तत्र सा अर्चयन्तीः चिरण्टीः प्रेक्ष्य गत्वा प्राह, 'इदं युष्माभिः किं उ क्रियते?'९१।

त्या चित्रकलाकुशल, सुशील, गुणी आणि सुलक्षणी मुलीला सुमंतूंनी आपल्या गृह्यसूत्रानुसार ब्राह्म विवाहाने कौंडिण्य ऋषींना दिली.८८. विवाहानंतर सासऱ्यांच्या आग्रहाने मुलगी आणि जावई तिथे राहिले. पण नंतर सासूच्या छळाला कंटाळून कोंडिण्य मुनी सासऱ्यांची अनुज्ञा घेऊन तिथून सपत्नीक निघाले.८९. त्या वेळी सुमंतूच्या त्या क्रोधी पत्नीने घरातील कपाटांना कुलूपे लावून लेक-जावयांना काहीच शिदोरी दिली नाही. सुमंतू ऋषींनी बाहेर पडलेला गव्हाचा कोंडा तेवढा बांधून देऊन लेक आणि जांवई रवाना झाले.९०. दुपारच्या वेळी ते एका नदीकाठी थांबले असता त्या कन्येने तिथे कांही सुवासिनी मिळून पूजा करताना पाहिल्या. तेव्हा तिने त्यांच्याजवळ जाऊन विचारले, 'तुम्ही सर्वजणी हे काय करीत आहांत?'९१ 'हे अनंतव्रत अनंत फल देते' हा अर्थवाद आहे. चातुर्मास्याच्या फलाप्रमाणे केवळ प्रशंसा करणे हाच त्याचा उद्देश्य आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. अर्थवाद तीन प्रकारचे आहेत. वास्तव्याशी विरोध असेल तर तो गुणवाद होतो, दुसऱ्या प्रमाणांशी सुसंगत असेल तर अनुवाद होतो आणि वस्तुनिष्ठ असेल तर भूतार्थवाद होतो (*विरोधे गुणवादः स्यादनुवादोऽवधारिते। भूतार्थवादस्तद्धानादर्थवादस्त्रिधा मतः।।*). 'यूप (यज्ञस्तंभ) हा आदित्य आहे' या विधानांत सूर्याची तेजस्विता गुण यूपांत आहे असा भावार्थ आहे.

**।। स्त्रिय ऊचुः ।।**

**भाद्रशुद्धचतुर्दश्यामद्यानन्तव्रतं शृणु । स्नात्वा रक्ताम्बरं धृत्वा रक्तसूत्रे चतुर्दश ।।९२।।**
**ग्रन्थीन्बध्वा सप्तफण-दर्भशेषे निधाय तम् । कुम्भोपरि चतुर्बाहुं ध्यात्वानन्तं प्रपूज्य च ।।९३।।**

स्त्रियः ऊचुः। अद्य भाद्र+शुद्ध+चतुर्दश्यां अनन्तव्रतम्। शृणु। स्नात्वा रक्त+अम्बरं धृत्वा, रक्त+सूत्रे चतुर्दश ग्रन्थीन् बध्वा सप्त+फण+दर्भ+शेषे निधाय कुम्भ+उपरि चतुः+बाहुं अनन्तं ध्यात्वा, प्रपूज्य च,।९२-९२।

वस्तुतः यूप वेगळा आणि सूर्य वेगळा. हे गुणवादाचे उदाहरण आहे. 'अग्नी हे थंडीचे औषध आहे' ह्या विधानाची इतर प्रमाणांनी पुष्टी होते म्हणून तो अनुवाद ठरतो. भूतार्थवादांत विधानाची आणि इतर प्रमाणांची अर्थशः एकवाक्यता असते. चराचर जगताशी एकरूप असूनही त्याहून अधिक आणि वेगळे स्वरूप असणारा अनंत इथे उपास्य म्हणून प्रतिपादलेला आहे. त्यामुळे त्याची प्राप्ती ह्या फळाचे आनंत्य त्याच्याशी सुसंगत आहे. म्हणून हा भूतार्थवाद होतो. अनंत फळ याचा अर्थ एकाच वेळी सर्व कामांची पूर्णता. ही फक्त आत्मानुभवातच होते. तैत्तिरीय उपनिषदाचे (२:१:१) वचन आहे की, 'गहन अंतरांतल्या सत्य, ज्ञान, अनंत अशा ब्रह्माला जाणणाऱ्याच्या सर्व कामांची पूर्ती होते.' अज्ञानी पुरुष एकामागून एक कर्मफलांनी मिळालेली शरीरे धारण करून डोळे, कान इत्यादि उपाधींच्या माध्यमांतून, पाण्यातल्या सूर्यासारख्या जीवरूपाने त्या त्या भोगांचा अनुभव घेतो. ज्ञानी मात्र सर्व सुखभोग एकाच वेळी अनुभवतो. असे फळ अनंतव्रताने लाभत असल्याने ते अनंत व्रत आहे. चातुर्मास्याप्रमाणे केवळ प्रशंसात्मक अक्षय्य फळ नाही.

त्या स्त्रिया तिला म्हणाल्या, 'आज भाद्रपद शुक्ल चतुर्दशी असून हा अनंतव्रताचा नियत दिवस आहे. ते कसे करायचे ते ऐक. स्नान करून लाल वस्त्र परिधान करावे. मग लाल दोरकाला चौदा गाठी बांधून, तो पाण्याने भरलेल्या कलशावर ठेवलेल्या सात फणांच्या दर्भाच्या शेषावर स्थापन करावा. त्याच्यावर चतर्भुज अनंताचे ध्यान करून त्याची पूजा करावी.९२-९३.

**दत्वा चतुर्दशापूपान् ब्रह्मणे जीर्णदोरकम् । विसृज्य दत्वा नूत्नं स्वे बध्वा हस्ते च दम्पती ।।९४।।**
**संतर्प्याब्दे घटान्दद्याच् चतुर्दश चतुर्दशे । प्रत्यब्दं पूजयेद् भक्त्या वरं नातः परं व्रतम् ।।९५।।**
**कुर्वदोऽभीष्टदमपि प्रोक्त्वास्यै दोरकं ददुः । सापि तत्र व्रतं कृत्वा पतिं प्राप सदोरका ।।९६।।**
**ततो यान्तौ धनी कश्चिद् ग्रामं नीत्वा श्रियं ददौ । तत्रानन्तप्रसादात्तौ श्रीमानाढ्यौ बभूवतुः ।।९७।।**
**दोरं दृष्ट्वैकदाग्नौ स जहौ मत्वा वशीकृतिम् । श्रीदानन्तं न त्यजेति वारितोऽपि तया ऋषिः ।।९८।।**

ब्रह्मणे चतुर्दश अपूपान् दत्वा, जीर्ण+दोरकं विसृज्य दत्वा, नूत्नं स्वे हस्ते बध्वा च, दम्पती संतर्प्य,।९४। चतुर्दशे अब्दे चतुर्दश घटान् दद्यात्। प्रति+अब्दं भक्त्या पूजयेत्। अतः परं व्रतं न।९५। अभीष्ट+दं अपि इदं कुरु। इति प्रोक्त्वा अस्यै दोरकं ददुः। सा अपि तत्र व्रतं कृत्वा सदोरका पतिं प्राप।९६। ततः यान्तौ कश्चित् धनी ग्रामं नीत्वा श्रियं ददौ। तत्र तौ अनन्त+प्रसादात् श्रीमान् आढ्यौ बभूवतुः।९७। एकदां दोरं दृष्ट्वा वशी+कृतिं मत्वा सः ऋषिः, तया 'श्री+द+अनन्तं न त्यज'इति वारितः अपि, अग्नौ जहौ।९८।

त्याला चौदा अपूपांचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणाला द्यावेत. जुन्या (आधीच्या वर्षाच्या) दोरकाचे विसर्जन करून तो ब्राह्मणाला दान करावा आणि नवा पूजा केलेला दोरक हातात बांधावा. अनंताप्रीत्यर्थ एका दंपतीला भोजन घालावे.९४. असे चौदा वर्षे व्रत केल्यावर चौदा घटांचे दान करून उद्यापन करावे. यापेक्षा श्रेष्ठ व्रत नाही.९५. हे आपले अभीष्ट प्राप्त करून देणारे व्रत आहे. तूसुद्धा हे व्रत कर.' असे म्हणून त्यांनी तिलाही एक दोरक दिला. तिनेही ते व्रत केले आणि दोरक हातात बांधून पतीकडे आली. इतर व्रतात स्त्रियांना स्वातंत्र्य नसले तरी परमार्थांत मात्र त्यांना स्वातंत्र्य आहे असे इथे दिसते. अन्यथा देवाचा प्रसाद कसा होईल?९६. तिथून पुढे जात असता कुणी एका धनवान् गृहस्थाने त्यांना आपल्या गावात नेऊन खूपशी संपत्ती दिली. तिथे अनन्ताच्या कृपाप्रसादाने ते संपन्न आणि प्रतिष्ठित झाले.९७. एकदा कौंडिण्य ऋषींनी पत्नीच्या हातातला तो दोरा पाहिला आणि हा कांही वशीकरणाचा प्रकार आहे अशा समजुतीने, पत्नी 'अहो वैभव देणारा अनंत टाकू नका' अशी विनवणी करूनही त्या मुनीनी आगीत टाकून दिला.९८.

**तदाहृताग्न्यरिभ्यः श्रीस् ततोऽनन्तं स्मरन्नटन् । वनेऽनन्तः क्वेति स गो-द्रुगाः पृष्ट्वाप कश्मलम् ॥९९॥**
**तस्मै नीत्वा वृद्धविप्र-रूपेण पुरमद्भुतम् । स्वं रूपं दर्शयामास तुष्टावानन्तमप्यसौ ॥१००॥**
**जय सर्वेश्वरानन्त विश्वव्यापिन्जनार्दन । त्वन्मायामोहितधिया कृतान्मन्तून्क्षमस्व मे ॥१०१॥**

**॥ श्रीमदनन्त उवाच ॥**

**न दैन्यं दुष्कृतं तेऽत्र श्रियं भुक्त्वा पुनर्वसुः । नक्षत्रेषु प्रसादान्मे भविष्यसि महामुने ॥१०२॥**

तदा अग्नि+अरिभ्यः श्रीः हृतः। ततः सः अनन्तं स्मरन् वने अटन् 'अनन्तः क्व?' इति गो+द्रु+गाः पृष्ट्वा कश्मलं आप।९९। तस्मै वृद्ध+विप्र+रूपेण अद्भुतं पुरं नीत्वा स्वं रूपं दर्शयामास। असौ अपि अनन्तं तुष्टाव।१००। '(हे) ईश, भगवन् त्वं वाच्य+वाचक+तया जगत्+मयः ॐकार+वाच्य त्रिगुण+आत्मकः असि। (हे) सर्व+ईश्वर, विश्व+व्यापिन्, जनार्दन, त्वत्+माया+मोहित+धिया कृतान् मे मन्तून् क्षमस्व।'१०१। श्रीमत् अनन्त उवाच। 'ते दैन्यं दुष्कृतं न। (हे) महामुने, अत्र श्रियं भुक्त्वा मे प्रसादात् नक्षत्रेषु पुनर्वसुः भविष्यसि।'१०२।

तेव्हा अनंताच्या कोपाने त्यांची सर्व संपत्ती अग्नी आणि शत्रू यांनी हिरावून घेतली. तेव्हा 'हा अनंताचाच कोप आहे,' असे जाणून तो कौंडिण्य अनंताचे स्मरण करीत, 'अनंत मला कुठे भेटेल?' असे बैल, वृक्ष, गाय यांना विचारीत वनात भटकता भटकता मूर्च्छित झाला.९९. तेव्हा अनंतदेवाला दया येऊन त्यांनी त्याला सावध करून त्याला धीर देऊन एका अद्भुत नगरीत नेले आणि आपले स्वरूप दाखविले. ऋषींनी त्यांचे स्तवन केले.१००. भगवंता, ईश्वरा, वाच्य आणि वाचक तूच असल्याने तू जगताला व्यापून उरला आहेस. तूंच ॐकाराचा अर्थ आहेस आणि त्रिगुणात्मक आहेस. जनार्दना, तुझ्याच मायेने भुलून मी केलेल्या अपराधांची क्षमा कर.१०१. श्रीमत् अनन्तांनी त्याला वर दिला, 'तुला दैन्य आणि पाप लागणार नाहीत. इहजन्मी वैभव भोगून तू माझ्या प्रसादाने नक्षत्रमंडलांत पुनर्वसु होशील.'१०२.

|| ऋषिरुवाच ||

**केऽपि सत्फलिताम्रस्य फलं नाश्नन्ति गोर्मुखे । तृणं नैति पशोश्चापि स्वाद्वप्पूर्णे सरोवरे ||१०३||**
**जीवास्पृष्टेऽग्रतो दीनौ खरेभौ च द्विजो जरन् । एते दृष्टा मयैतेषां कुतोऽभूदीदृशी स्थितिः ||१०४||**

|| श्रीमदनन्त उवाच ||

**शिष्यान्नापाठयन्मत्तो विद्वांस्तेनाम्र ईदृशः । गौर्जाता मोघभूदानाद् वृषोऽदाताभवद्धनी ||१०५||**
**अन्योन्यदानग्रहणादीदृश्यौ स्तः सरस्युभे । खरः क्रोधीभो मदी च द्विजोऽहं तेऽपि मोचिताः ||१०६||**

ऋषिः उवाच। 'सत्+फलित+आम्रस्य फलं के अपि न अश्नन्ति। गोः मुखे तृणं न एति पशोःअपि। स्वादु+अप्+पूर्णे सरोवरे जीव+अस्पृष्टे।१०३। अग्रे दीनौ खर+इभौ, जरत् द्विजः च। एते मया दृष्टाः। एषां ईदृशी स्थितिः कुतः अभूत्?'१०४। श्रीमत् अनन्त उवाच। 'मत्तः विद्वान् शिष्यान् न अपठयन् तेन ईदृशः आम्रः। मोघ+भू+दानात् गौः जाता। अदाता धनी वृषः अभवत्।'१०५। उभे अन्यः+अन्य+दान+ग्रहणात् सरसि स्तः। क्रोधी खरः, मदी च इभः। अहं द्विजः। ते अपि मोाचिताः।'१०६।

ऋषींनी अनन्ताला विचारले, 'मी येताना एक आंबा पाहिला. तो उत्तम फळांनी लखडलेला असूनही त्याची फळे कुणीच खात नाहीत. तसेच पुढे एक गाय पाहिली. तिच्या व पशूंच्या तोंडात गवतच येत नाही. पुढे गोड पाण्याने भरलेल्या दोन तळ्या पाहिल्या. त्यांना कुठलेही जीव स्पर्शत नव्हते.१०३. पुढे दीनवाणे दिसणारे एक गाढव व एक हत्ती पाहिले. आणि एक वृद्ध ब्राह्मण पाहिला. त्यांची ही अशी अवस्था का झाली?'१०४. श्रीमत् अनन्तदेव म्हणाले, 'आपल्या विद्वत्तेच्या मदात शिष्यांना न शिकवल्याने तो विद्वान् असा आम्रवृक्ष झाला. नापीक जमिनीचे दान करणारी या गाईच्या जन्माला आली. धनवान् असूनही दान न केल्याने बैल झाला.१०५. दोघींनी आपापसांतच दान दिले-घेतले म्हणून त्या ह्या तळ्या झाल्या. क्रोधी माणसाला गाढवाचा, मदोन्मत्ताला हत्तीचा जन्म मिळाला. तो वृद्ध मीच होतो. या सर्व तू पाहिलेल्या जीवांना मुक्ती दिली.'१०६.

**इति लब्धवरोऽनन्तं नत्वैत्य स तथाभवत् । तस्माद्व्रतोत्तमं धर्म व्रतं चर हितं भवेत् ।।१०७।।**
**इति कृष्णोऽब्रवीत्सोऽपि व्रतं कृत्वा हताहितः । अकण्टकं चिरं राज्यमृद्धं भुक्त्वामृतं ययौ ।।१०८।।**
**त्वमप्याचर विप्रेदमत्रामुत्रापि सौख्यदम् । इत्युक्तः प्रभुणानन्त-व्रतं चक्रे द्विजोत्तमः ।।१०९।।**
**तत्र स्थित्वा स्वकैः सार्धं प्रेत्य सायुज्यमाप्तवान् । तद्वंशजा अपि गुरोः प्रसादात्तादृशोऽभवन् ।।११०।।**

'इति लब्ध+वरः सः अनन्तं नत्वा एत्य तथा अभवत्। तस्मात् (हे) धर्म, व्रतं चर हितं भवेत्।'१०७। इति कृष्णः अब्रवीत्। सः अपि व्रतं कृत्वा हत+अहितः अकण्टकं चिरं ऋद्धं राज्यं भुक्त्वा अमृतं ययौ।१०८। '(हे) विप्र त्वं अपि अत्र अमुत्र अपि सौख्यदं (व्रतं) आचर।' इति प्रभुणा उक्तः द्विजउत्तमः अनन्तव्रतं चक्रे।१०९। स्वकैः सार्धं तत्र स्थित्वा प्रेत्य सायुज्यं आप्तवान्। तत् वंशजाः अपि गुरौः प्रसादात् तादृशाः अभवन्।११०।

'असा वर पावून त्या कौंडिण्याने अनन्ताला नमस्कार केला. घरी परत येऊन त्याप्रमाणेच सिद्धी मिळाली. यासाठी, हे धर्मराजा, तू हे महान् व्रत कर. तुझे कल्याण होईल!'१०७. असा श्रीकृष्णाचा आदेश झाल्याप्रमाणे त्याने अनंतव्रत केले. त्यायोगे त्याने शत्रूचा नाश करून अकंटक आणि समृद्ध राज्य दीर्घकाल उपभोगले आणि अंती मोक्ष पावला.१०८. श्रीगुरू सायंदेवाला सांगतात, 'ब्राह्मणा, तूसुद्धा ह्या इह आणि परत्र सुख देणाऱ्या व्रताचे आचरण कर.' अशी श्रीगुरूंची आज्ञा घेऊन त्या ब्राह्मणवर्याने अनंतव्रत केले.१०९. आपल्या कुटंबासह तिथे गाणगापुरांत राहून मृत्यूनंतर सायुज्य मुक्तीचा धनी झाला. त्याचे वंशजही श्रीगुरूंच्या प्रसादाने त्याच्यासारखेच झाले.११०.

**त्वमपीदृक्तत्प्रसादाद् भक्तिमानसि सद्गुरौ । मा भीस्तरिष्यसि भवं मृगतृष्णोपमं द्रुतम् ।।१११।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।**

**आदितः विंशोऽध्यायः ।।**

त्वं अपि तत्+प्रसादात् ईदृक् सत्+गुरौ भक्तिमान् असि। मा भीः। मृग+तृष्ण+उपमं भवं द्रुतं तरिष्यसि।१११।

नामधारका, तूही त्यांच्याप्रमाणेच सद्गुरूंच्या भक्तीने संपन्न आहेस! भिऊ नकोस! हा मृगजळासारखा संसारसागर तू सहज तरून जाशील.'

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा दुसरा आणि प्रथमपासून विसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथैकविंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**साधूदितं चरित्रं भो प्रभोर्धन्यं दिनं त्विदम् । क्षणमात्रोऽपि कालोऽद्य नातीतस्तत्कथामृते ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**तन्तुको नाम भक्तोऽभूत् त्रियामं भगवत्प्रियः । संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तमाभजत् ।।२।।**
**तद्बन्धुता कदाचित्तं श्रीशैलं गन्तुमाह्वयत् । स प्राह मे मठः शैलः श्रीगुरुर्मल्लिकार्जुनः ।।३।।**

नामधारक उवाच। भोः प्रभोः चरित्रं साधु उदितम्। इदं दिनं तु धन्यम्। अद्य क्षणमात्रः अपि कालः तत् कथां ऋते न अतीतः।१। सिद्ध उवाच। तन्तुकः नाम भगवत्+प्रियः भक्तः अभूत्। त्रियामं संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तं आभजत्।२। कदाचित् तत् बन्धुता तं श्रीशैलं गन्तुं आह्वयत्। स प्राह, 'मठः मे शैलः, श्रीगुरुः मल्लिक+अर्जुनः'। 'कुतः न इतः असि' इति अजेन पृष्टः अपि पूर्ववत् प्राह।३।

नामधारक म्हणाला, 'आपण श्रीगुरुप्रभूंचे चरित्र फार उत्तम सांगितले. आजचा दिवस खरोखर धन्य आहे! क्षणभरसुद्धा आज श्रीगुरूंच्या कथेवाचून गेला नाही.'१. सिद्धमुनींनी सांगायला सुरुवात केली. 'तन्तुक नावाचा श्रीगुरूंना प्रिय असलेला एक शिष्य होता. तो दिवसाचे तीन प्रहर आपले सांसारिक कर्तव्य पार पाडून एक प्रहर (तीन तास) श्रीगुरूंची सेवा करीत असे.'२. एकदा त्याची भावकी श्रीशैल्याच्या यात्रेला निघाली. तेव्हा त्यालाही आपल्याबरोबर येण्याचा त्यांनी आग्रह केला. तो म्हणाला, 'गाणगापूरचा हा मठ हेच माझे श्रीशैल्य आहे; आणि श्रीगुरू हेच माझे मल्लिकार्जुन आहेत.'३.

**सा तं निषिध्य मूर्खोऽयमिति मत्वा ययौ नगम् । कुतो नेतोऽसीत्यजेन पृष्टोऽपि प्राह पूर्ववत् ।।४।।**
**ततो माघेऽल्पकालेन शिवरात्रिरुपस्थिता । मध्याह्ने तद्दिनेऽजस्तं प्राह शैलोत्सवोऽद्य सन् ।।५।।**

**।। तन्तुक उवाच ।।**

**त्वत्पादाब्जोत्सवान्मन्ये क्वापि नास्त्यधिकोत्सवः । इदं प्रत्यक्षमज्ञाय मुधा मुग्धा भ्रमन्ति कौ ।।६।।**
**तच्छ्रुत्वा प्राह भगवान्मा ब्रूहीदं जगत्प्रभुः । सर्वत्रावस्थितोऽप्येष सत्क्षेत्रमहिमा वरः ।।७।।**
**महातपस्विभिः क्षेत्रं पवित्रीकृतमस्ति तत् । परमात्मा तत्प्रभावात् तत्र जागर्त्यनारतम् ।।८।।**

सा तं निषिध्य, 'अयं मूर्खः' इति मत्वा नगं ययौ।४। ततः अल्प+कालेन माघे शिवरात्रिः उपस्थिता। तत् दिने मध्य+अह्ने अजः तं प्राह। अद्य शैल+उत्सवः सन्।५। तन्तुक उवाच। त्वत्+पाद+अब्ज+उत्सवात् अधिकः क्व अपि उत्सवः न अस्ति। इदं प्रत्यक्षं अज्ञाय मुग्धा मुधा कौ भ्रमन्ति।६। तत् श्रुत्वा भगवान् प्राह। इदं मा ब्रूहि। जगत्+प्रभुः सर्वत्र अवस्थितः अपि एष सत्+क्षेत्रमहिमा वरः।७। क्षेत्रं महा+तपस्विभिः पवित्री+कृतं अस्ति। तत् तत्+प्रभावात् परमात्मा तत्र अनारतं जागर्ति।८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'आपल्या बांधवांसह श्रीशैल्याला का गेला नाहीस?' तेव्हाही त्याने पूर्वीप्रमाणेच उत्तर दिले.४. पुढे थोड्याच काळाने माघ महिन्यात शिवरात्र आली. त्या दिवशी माध्याह्नी श्रीगुरू म्हणाले, 'आज श्रीशैल्याचा मोठा उत्सव आहे.'

तन्तुक उत्तरला, 'आपल्या चरणकमलांपेक्षा मोठा उत्सव कुठेच नाही. हे प्रत्यक्ष सोडून अज्ञानी लोक उगीच पृथ्वीवर भटकत असतात.'६. त्याचे बोलणे ऐकून श्रीगुरुभगवान म्हणाले, 'असे बोलू नकोस. जगाचा स्वामी सर्वत्रच आहे हे खरे आहे. पण पुण्यक्षेत्रांचा महिमा थोर आहे.७. क्षेत्र महान् तपस्व्यांनी आपल्या वास्तव्याने पवित्र केलेले असते. म्हणून त्यांच्या प्रभावाने तिथे परमेश्वर निरंतर जागत असतो.८.

**अतस्तत्रैव भजतां कार्यसिद्धिर्भवत्यरम् । महातपस्विनो धन्याः स्वयं मुक्ता अपीतरान् ।।९।।**
**मोचयन्ति स्वतपसा जन्मसंसारबन्धनात् । लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः ।।१०।।**
**तत्संचारस्थलरजः-संस्पर्शोऽप्यत्र मुक्तये । अतस्तत्सेवितक्षेत्रे लोको यास्यति सादरम् ।।११।।**
**एह्यद्य योगगत्याद्रिं गत्वा ते दर्शयामि तत् । इत्युक्त्वा पादुके दिव्ये धारयित्वा दृढं दृशौ ।।१२।।**
**निमीलयित्वा श्रीशैलं सह तेन ययौ क्षणात् । प्राहोन्मील्य दृशौ पश्य श्रीशैलममुमित्यजः ।।१३।।**

अतः तत्र एव भजतां अरं कार्य+सिद्धिः भवति। महा+तपस्विनः धन्याः। स्वयं मुक्ताः अपि इतरान्..।९। स्व+तपसा जन्म+संसार+बन्धनात् मोचयन्ति। सत्+तपस्वि+विभूतयः लोक+उद्धृत्यै प्रजायन्ति।१०। 'तत् संचार+स्थल+रज+स्पर्शः अपि अत्र मुक्तये। अतः तत्+सेवित+क्षेत्रे लोकाः सादरं याति'।११। 'एहि, अद्य योग+गत्या अद्रिं गत्वा तत् ते दर्शयामि,' इति उक्त्वा दिव्ये पादुका धारयित्वा, दृशौ दृढं..।१२। निमीलयित्वा तेन सह क्षणात् श्रीशैलं ययौ। 'अमुं श्रीशैलं, दृशौ उन्मील्य पश्य,' इति अजः प्राह।१३।

त्यामुळे तिथे पूजा-पाठ-जप आदि उपासना करणाऱ्यांची कार्यसिद्धी लवकर होते. महातपस्वी हे स्वतः तर मुक्त असतातच पण इतरांनाही..(९) आपल्या तपाच्या सामर्थ्याने मुक्त करतात. लोकांच्या उद्धारासाठीच ह्या थोर तपस्वी विभूती जन्माला येतात.१०. (*जगाच्या कल्याणा संताच्या विभूती।* संत तुकाराम)' 'त्यांच्या संचाराने पावन झालेल्या भूमीची धूळ जरी लागली तर माणूस मुक्त होतो. म्हणून त्यांच्या वासाने पवित्र झाालेल्या क्षेत्रांना लोक आदरपूर्वक जातात.(११) चल, आज योगगतीने मी तुला नेऊन श्रीशैल्याचे दर्शन घडवितो.' असे म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपल्या दिव्य पादुका धरून डोळे घट्ट मिटायला सांगितले. क्षणार्धात श्रीशैल्याला येऊन म्हणाले, 'डोळे उघडून पाहा हा श्रीशैल्य पर्वत!'१३.

**सोऽप्युन्मीलितदृग्दृष्ट्वा श्रीगिरिं तदनुज्ञया । क्षौरस्नानादि कृत्वागाद् द्रष्टुं श्रीमल्लिकार्जुनम् ।।१४।।**
**यान्तं स्वकः प्रेक्ष्य तमाह नोऽनु-यातोऽसि कस्मान्न युतिं करोषि ।**
**अद्य क्षणाच्छ्रीगुरुणाऽऽहृतोऽस्मी-त्युक्तोऽपि तेनोक्तममंस्त मिथ्या ।।१५।।**
**तस्मै यथास्वं स निवेद्य भक्तो । गुर्वङ्घ्रिपद्मद्वय एकतानः ।**
**प्रासादमेत्यान्तरनेकलोक-व्याप्तं विवेशेश्वरदर्शनाय ।।१६।।**
**तत्रोपविष्टं गुरुमर्चयन्ति । सर्वेऽपि कश्चिन्न हि तत्र देवः ।**
**इत्थं विलोक्यापि गुरुं प्रपूज्य । पुनर्गुरुं प्राप्य तदुक्तवान्सः ।।१७।।**

सः अपि उन्मीलित+दृक् श्रीगिरिं दृष्ट्वा तत् अनुज्ञया क्षौर+स्नान+आदि कृत्वा श्रीमल्लिकार्जुनं द्रष्टुं अगात्।१४। स्वकः यान्तं प्रेक्ष्य तं आह, 'नः अनुयातः असि! कस्मात् युतिं न करोषि?' तेन उक्तम् 'अद्य क्षणात् गुरुणा आहृतः अस्मि', मिथ्या ममंस्त।१५। सः भक्तः तस्मै यथास्वं निवेद्य गुरु+अङ्घ्रि+पद्म+द्वय एकतानः अनेक+लोक+व्याप्तं प्रासादं एत्य ईश्वर+दर्शनाय अन्तः विवेश।१६। तत्र सर्वे अपि उपविष्टं गुरुं अर्चयन्ति। तत्र कश्चित् देवः न हि। इत्थं विलोक्य अपि गुरुं प्रपूज्य पुनः गुरुं प्राप्य सः तत् उक्तवान्।१७।

तंतुकाने डोळे उघडून श्रीगिरीचे दर्शन घेतले. मग त्याने श्रीगुरूंच्या आज्ञेने क्षौर, स्नान इत्यादि करून तो श्रीमल्लिकार्जुनाच्या दर्शनासाठी निघाला.१४. त्याला देवळात जाताना त्याच्या आप्ताने पाहिले. तो म्हणाला, 'आमच्या मागे मागे आलास तर मग वाटेत आम्हाला का भेटला नाहीस?' त्याने आपल्याला श्रीगुरूंनी आत्ता एका क्षणापूर्वी आणल्याचे सांगितले. त्याचा त्याच्यावर विश्वास न बसल्याने तो खोटे सांगतो असेच त्याला वाटले.१५. त्या आप्ताचे यथायोग्य समाधान करून तो श्रीगुरुचरणांच्या पायांच्या चिंतनात एकाग्रचित्त होऊन, दर्शनोत्सुक लोकांनी गजबजलेल्या त्या मंदिरांत आला आणि ईश्वरदर्शनासाठी त्याने अंतर्गृहात प्रवेश केला.१६. त्याने पाहिले तर तिथे कोणताच देव नसून श्रीगुरूच बसलेले आहेत. सर्व लोक त्यांचीच पूजा करीत आहेत. त्यानेही श्रीगुरूंची पूजा केली आणि पुन्हा श्रीगुरूंपाशी येऊन म्हणाला.१७.

**अत्र त्वमेवासि कुतोऽज्ञलोका । आयान्ति हित्वा निकटस्थितं त्वाम् ।**
**व्याप्याखिलं त्वं परिपूर्णविश्वं । दशाङ्गुलं तिष्ठसि वक्ति वेदः ।।१८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**एकः परात्मा भजतां तथापि । स्थानप्रभावः प्रिय भिन्न एव ।**
**स्थानं त्विदं सर्वजनाश्रयं सन् । मुक्तिप्रदं शृण्विह पूर्ववृत्तम् ।।१९।।**
**विमर्षणो नाम नृपः किरात-देशे कृती क्षात्रवृषप्रवीणः ।**
**द्विजातिभक्तोऽपि च भूतमात्र-हिते रतः साधुजनानुयायी ।।२०।।**

'त्वं एव अत्र असि! अज्ञ लोकाः निकट+स्थितं त्वां हित्वा कुतः आयान्ति? (हे) परिपूर्ण, वेदः वक्ति, त्वं अखिलं विश्वं व्याप्य दश+अङ्गुलं तिष्ठसि।'१८। श्रीगुरुः उवाच। (हे) प्रिय, पर+आत्मा एकः। तथापि भजतां स्थान+प्रभावः भिन्न एव। इदं तु सर्व+जन+आश्रयं मुक्ति+प्रदं सन् स्थानम्। इह पूर्ववृत्तं शृणु।१९। किरात+देशे विमर्षणः नाम क्षात्र+वृष+प्रवीणः कृती नृपः द्विजाति+भक्तः अपि च भूत+मात्र+हिते रतः साधु+जन+अनुयायी।२०।

'इथे मंदिरातही आपणच आहात! हे वेडे लोक निकटच असलेल्या तुम्हाला सोडून इतक्या दूर का बरे येतात? परिपूर्ण सद्गुरो, वेदांत सांगितल्याप्रमाणे आपण सर्व विश्व व्यापून दहा अंगुळे उरलेला आहात.' अधिष्ठानत्वाने विवर्ताहून अधिक आहात असा भावार्थ.१८. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'प्रिय भक्ता, परमात्मा एकच आहे. तरीही उपासकांसाठी त्या त्या स्थानांचा प्रभावही वेगवेगळा असतो. हे श्रीशैल्य सर्व लोकांना आश्रयभूत आणि मुक्तिप्रद स्थान आहे. तुला एक प्राचीन कथा सांगतो, ऐक.' १९. किरात देशी एक विमर्षण नावाचा राजा होता. तो क्षात्रधर्मात कुशल, कर्तृत्ववान्, सर्व जीवांचे हित जपणारा, देवद्विजांचा भक्त आणि साधूंचे अनुसरण करणारा होता.२०.

**स्त्रीलम्पटः प्राग्गुणतो निषिद्धभुक् । शैवोत्तमः शङ्कररूपचिन्तकः ।**
**तं प्राह साध्वी महिषी कथं शिवे । भक्तिर्दृढा धर्मविरुद्धचेष्ट ते ।।२१।।**

**।। राजोवाच ।।**

**पम्पापुरे श्वाभवमाद्यजन्यामुच्छिष्टमत्तुं शिवसद्म यातम् ।**
**हन्युर्जना द्वारि मृतिक्षणेऽजो । दृष्टोऽर्चितः प्रोज्वलिताश्च दीपाः ।।२२।।**
**प्रदक्षिणं तं हि परीत्य शैवे । दिने मृतस्तेन नृपोऽत्र शैवः ।**
**ये दुर्गुणास्ते श्वनिसर्गजोत्थाः । स्युः पूर्वसंस्कृत्यनुगो हि जीवः ।।२३।।**

शैव+उत्तमः शङ्कर+रूप+चिन्तकः (अपि) प्राक्+गुणतः स्त्री+लम्पटः निषिद्ध+भुक् (आस)। साध्वी महिषी तं प्राह, '(हे) धर्म+विरुद्ध+चेष्ट, ते शिवे दृढा भक्तिः कथम्?'२१। राजा उवाच। आद्य+जन्यां पम्पापुरे श्वा अभवम्। उच्छिष्टं अत्तुं शिव+सद्म यातं जनाः द्वारि हन्युः। मृति+क्षणे अर्चितः अजः, तं प्रदक्षिणं परीत्य हि, दृष्टः, प्रोज्वलिताः दीपाः च।२२। शैवे दिने मृतः तेन अत्र शैवः नृपः। ये दुर्गुणाः श्व+निसर्ग+ज+उत्थाः। जीवः पूर्व+संस्कृति+अनुगः स्युः।२३।

तो भगवान् शंकरांच्या रूपाचे सतत चिन्तन करणारा परम शिवभक्त असूनही पूर्वसंस्कारांमुळे स्त्रैण वृत्तीचा होता. तसेच त्याला अभक्ष्य भक्षणाचीही आवड होती. एकदा त्याच्या साध्वी पत्नीने - अभिषिक्त राणीने, त्याला विचारले, 'अहो, तुमचे आचरण असे धर्माविरुद्ध असूनही तुमची शंकरांच्या ठायी एवढी दृढ भक्ती कशी आहे?'२१. राजा उत्तरला, 'पूर्वजन्मी पंपापुरीत कुत्रा होतो. एकदा उष्टे-खरकटे कांही खायला मिळाले तर पाहावे म्हणून मी शंकराच्या देवळात जात असताना लोकांनी मला दारात मारून टाकले. मरताना माझी देवाला प्रदक्षिणा झाली, पूजा केलेल्या देवाचे दर्शन झाले आणि दारासमोर उजळलेले दीप दिसले.२२. तो दिवस सोमवार होता. त्या पुण्याईने मी हा शिवभक्त राजाचा जन्म पावलो आहे. माझे जे दुर्गुण आहेत श्वानस्वभावांतून आले आहेत.' भगवद्गीतेच्या वचनानुसार भौतिक शरीर आणि इंद्रिये यांच्या कर्तृत्वाला स्वभावच कारण असतो (*कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।।* १३:२०). विद्वान् किंवा

**प्राङ्मे जनिः क्वेति तयाह पृष्टः । प्राक्त्वां कपोतीं सति चञ्चुमांसाम् ।**
**चिल्लोऽहनच्छ्रीमदगे शिवाग्रे । प्राणार्पणान्मे महिषीह जाता ।।२४।।**
**क्वेतो भवान् यास्यसि चाप्यहं क्व । शंसेति पृष्टः स तु सिन्धुदेशे ।**
**राजा भविष्याम्यपि सृञ्जयोत्था । मत्स्त्री त्वमग्रेऽपि कलिङ्गजा त्वम् ।।२५।।**
**सौराष्ट्रकेऽहं खलु मागधी त्वं । गान्धारजावन्तिदशार्णजौ च ।**
**नृपोऽप्यनन्तोऽपि ययातिजा त्वं । पाण्ड्योऽहमग्रेऽपि विदर्भजा त्वम् ।।२६।।**

तया 'प्राक् मे जनिः क्व?' इति पृष्टः आह। '(हे) सति, प्राक् त्वां चञ्चु+मांसां कपोतीं चिल्लः श्रीमत्+अगे अहनत्। शिव+अग्रे प्राण+अर्पणात् इह मे महिषी जाता।'२४। 'इतः भवान् क्व यास्यसि? अहं च अपि क्व? शंस' इति पृष्टः सःतु, 'सिन्धुदेशे राजा भविष्यामि। त्वं सृंजय+उत्था मत्+स्त्रीः। अग्रे अपि त्वं कलिङ्ग+जा,'।२५। 'अहं सौराष्ट्रके। त्वं मागधी (अहं) गांधारजः। अवन्तिदशार्णजौ च। अनन्तः नृपः त्वं ययाति+जा। अग्रे अहं पाण्ड्यः त्वं अपि विदर्भजा।२६।

भक्तही असला तरी तो आपल्या स्वभावानुसारच रहाटतो (*सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।* भ.गीता ३:३३)२३. तेव्हा राणीने आणखी विचारले, 'माझा पूर्वजन्म कुठे झाला?' राजाने सांगितले, 'तू मागच्या जन्मात कपोती होतीस.तू एकदा चोचीत मांसाचा घास घेऊन उडत असता श्रीशैल्यावर एका घारीने तुला त्या मांसासाठी मारून टाकले. शंकरासमोर प्राण अर्पण केल्याने तू इथे माझी पट्टराणी झालीस.'२४. 'आता यापुढच्या जन्मात तुमची माझी गती काय असेल? मला सांगा,' असे राणीने विचारल्यावर राजा सांगू लागला. 'मी पुढील जन्मात सिंधुदेशाचा राजा होणार आहे आणि तुझा जन्म सृंजय देशाच्या राजाच्या पोटी होईल आणि पुन्हा तुझे माझ्याशीच लग्न होईल. त्यापुढच्या जन्मांत तू कलिंग देशाची राजकुमारी होशील.'२५. 'आणि मी सौराष्ट्रांत राजा होईन. चौथ्या जन्मात तू मगध देशाची राजकुमारी होशील गांधार देशात जन्मलेल्या माझ्याशी विवाह करशील. पाचव्या जन्मात अवन्ती आणि दशार्ण देशात जन्म घेऊन आपण लग्न करू. सहाव्या जन्मात मी अनन्तः नावाचा राजा होईन आणि तू ययातीची कन्या होऊन माझी पट्टराणी होशील. सातव्या जन्मात मी पांड्य देशाचा राजा आणि तू विदर्भाची राजकुमारी होशील.२६.

**स्मरोपमो धीगुणशीलशाल्यहं । वृत्वा तदा त्वां रतिभां स्वयंवरे ।**
**त्वया सहेष्ट्वा पुरुदक्षिणान्मखान् । सम्राट्तया प्राप्य सुतान्सुभोगयुक् ।।२७।।**
**लब्ध्वात्मतत्त्वं घटजाच्च जीवन्-मुक्तो भविष्यामि सह त्वयैवम् ।**
**राड्दम्पती वै प्रतिजन्म भूत्वा । मुक्तौ भविष्याव इति ह्यवोचत् ।।२८।।**
**शम्भोः पुरः साहजिकासुदानादेवं तिरश्चोऽपि गतिस्तु लोकाः ।**
**बुद्ध्वेदमायान्त्यपि देवता तु । स्थलानुमानात् खलु जागरूका ।।२९।।**
**इत्युक्त्वा धारयित्वेशः पादुके सङ्गमं क्षणात् । तमानीयेरयद् ग्रामं प्रहृष्टः प्रययौ स तु ।।३०।।**

स्मर+उपमः धी+गुण+शील+शाली अहं रति+भां त्वां स्वयंवरे वृत्वा, त्वया सह पुरु+दक्षिणान् मखान् इष्ट्वा सम्राट्तया सुतान् प्राप्य सुभोग+युक्।२७। घटजात् आत्मतत्त्वं लब्ध्वा जीवन्मुक्तः भविष्यामि। एवं त्वया सह प्रतिजन्म वै राट्+दम्पती भूत्वा मुक्तौ भविष्याव।' इति हि अवोचत्।२८। 'शम्भोः पुरः साहजिक असु+दानात् तिरश्च अपि एवं गतिः। लोकाः तु इदं बुद्ध्वा आयान्ति। देवता तु स्थल+अनुमानात् जागरूका खलु'।२९। इति उक्त्वा ईशः तं पादुके धारयित्वा क्षणात् सङ्गमं आनीयेरयत्। सः तु प्रहृष्टः ग्रामं ययौ।३०।

मी मदनासारखा सुंदर, बुद्धिमान, गुणवान् सुशील असेन आणि रतीसम रूपवान अशा तुझ्याशी स्वयंवरात लग्न करीन. तुझ्यासह मी सम्राट होऊन अनेक मोठमोठे यज्ञ करीन. अमरकोशानुसार (२:७:३), 'जो राजसूय यज्ञ करतो, राजमंडलाचा अधिपती असतो आणि ज्याच्या आज्ञेने राजे लोक शासन करतात तो सम्राट.' आपण सर्व ऐहिक सुखांचा भोग घेऊ. आपल्याला अनेक पुत्र होतील.२७ उतारवयात मी अगस्ती महर्षींकडून आत्मज्ञान प्राप्त करीन जीवन्मुक्त होईन. अशा रीतीने तुझ्यासह प्रत्येक जन्मात राजाराणी होऊन आपण मुक्त होऊ.'२९. तंतुकाला श्रीगुरू सांगतात, 'शिवमंदिरासमोर नैसर्गिक प्राणदानानेसुद्धा पशु-पक्ष्यांना अशी गती लाभते. (मग संकल्पपुरःसर जपतपादि करणाऱ्या मनुष्यांचे फळ किती असेल?) हे जाणून लोक श्रीशैल्याला येतात. तात्पर्य देवता स्थानाच्या प्रभावानुसार जागरूक असतात.'२९. इतके बोलून श्रीगुरूंनी तंतुकाला पुन्हा पादुका धरायला लावून क्षणभरात संगमावर आणले. तो हर्षोत्फुल्ल चित्ताने गाणगापूराला गेला.३०.

**तत्रत्याः सङ्गमेऽदृष्ट्वा गुरुं खिन्ना अवेक्ष्य तम् । आयान्तमब्रुवन्यान्तः कस्मात् क्षौरं कृतं त्वया ।।३१।।**
**स प्राह मां क्षणान्नीत्वा श्रीशैलं भो यथाविधि । क्षेत्राचारं कारयित्वा सम्प्रत्यत्रानयत्प्रभुः ।।३२।।**
**तच्छ्रुत्वात्रैष मध्याह्ने दृष्टो ब्रूते मृषेति ते । मत्वैत्य सङ्गमे तत्र निशि सर्व उपोषिताः ।।३३।।**
**चक्रुर्जागरणं शैव-नामोच्चारणपूर्वकम् । ततः शैलाज्जनः प्राप्तः पक्षात्स प्राह विस्मितः ।।३४।।**
**श्रीशैलेऽयं शिवद्वारि तन्तुकः सकृदीक्षितः । तदा सप्रत्ययाः सर्वे ननन्दुर्विस्मिता भृशम् ।।३५।।**

तत्रत्याः गुरुं सङ्गमे अदृष्ट्वा खिन्ना यान्तः तं आयान्तं अवेक्ष्य अब्रुवन् 'त्वया कस्मात् क्षौरं कृतम्?'।३१। सः प्राह, 'भो, प्रभुः मां क्षणात् श्रीशैलं नीत्वा, यथाविधि क्षेत्र+आचारं कारयित्वा सम्प्रति अत्र आनयत्'।३२। तत् श्रुत्वा ते 'एष मध्य+अह्ने दृष्टः, मृषा ब्रूते' इति मत्वा सङ्गमे एत्य तत्र निशि सर्व उपोषिताः।३३। शैव+नाम+उच्चारण+पूर्वकं जागरणं चक्रुः। ततः पक्षात् शैलात् जनः प्राप्तः। सः विस्मितः प्राह।३४। 'अयं तन्तुकः श्रीशैले शिव+द्वारि सकृत् ईक्षितः। तदा सर्वे स+प्रत्ययाः भृशं विस्मिताः ननन्दुः।३५।'

तंतुक त्वरेने गावाकडे जात असता, श्रीगुरू संगमावर नसल्याने खिन्न होऊन गावाकडे परतणारे तेथील लोक त्याला भेटले. त्यांनी त्याला येताना पाहून विचारले, 'अरे, तू हे क्षौर कशासाठी केलेस?'३१. तो म्हणाला, 'अहो, श्रीगुरुमहाराजांनी मला आज क्षणार्धात श्रैशैल्याला नेले. माझ्याकडून यथाविधी सर्व क्षेत्राचार करविला; आणि आत्ताच थोड्या वेळापूर्वी मला परत आणले!'३२. ते ऐकून त्या लोकांनी विचार केला की 'आत्तां दुपारीच तर याला इथे पाहिला. थापा मारतोय.' मग ते सर्व संगमावर आले. शिवरात्रीचा उपास करून रात्री(३३) शिवनामाच्या भजनाच्या गजरांत जागरण केले. पंधरा दिवसांनी तंतुकाचे भाऊबंद श्रीशैल्याहून परतले. त्यांनी सांगितले, 'हा तंतुक श्रीशैल्याला मंदिरासमोर एकदा पाहिला होता खरा!' तेव्हा सर्वांना श्रीगुरूंच्या सामर्थ्याचा प्रत्यय येऊन नवल वाटले आणि आनंदही झाला.३५.

**सद्गुरोः सेवया बाढं कर्मबन्धं निहत्य सः । सिषेवे परमानन्दं यत्र नो द्वन्द्वसाध्वसम् ।।३६।।**
**एकैकयापि भक्त्यैवं मुक्ताः कति न वेद तान् । कवी शिष्यावभूतां तौ मुक्तौ श्रीगुरुकीर्तनात् ।।३७।।**
**गुरुलीलामयास्ताभ्यां प्रभूता ग्रथिताः कथाः । तल्लीला वक्ति कः कात्स्न्यार्द्यत्र वेदोऽपि शङ्कितः ।।३८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कौ शिष्यौ सद्गुरोर्जातौ तन्मे कथय सादरम् । वक्ता हि श्रोतृपृच्छाशीः स्मृतिमेति यतः कथा ।।३९।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**नन्दिशर्मा द्विजः कश्चित् कुष्ठार्तः तुलजापुरि । त्र्यब्दं तेपे तपः स्वप्ने देव्योक्तं गच्छ चेश्वरीम् ।।४०।।**

सद्गुरोः सेवया कर्म+बन्धं बाढं निहत्य परम+आनन्दं सिषेवे यत्र द्वन्द्व+साध्वसं नो।३६। एवं एक+एकया अपि भक्त्या कति मुक्ताः तान् न वेद। कवी शिष्यौ अभूतां तौ श्रीगुरु+कीर्तनात् मुक्तौ।३७। ताभ्यां ग्रथितां गुरु+लीला+मयाः कथाः प्रभूताः। यत्र वेदः अपि शङ्कितः तत् लीलाः कः कात्स्न्यार्त् वक्ति?३८। नामधारक उवाच। 'सद्गुरोः कौ शिष्यौ जातौ तत् सादरं मे कथय। वक्ता हि श्रोतृ+पृच्छ+आशीः यतः कथा स्मृतिं एति।'३९। सिद्ध उवाच। 'कश्चित् नन्दिशर्मा कुष्ठ+आर्तः द्विजः तुलजा+पुरि त्रि+अब्दं तपं तेपे। देव्या स्वप्ने उक्तं च 'ईश्वरीं गच्छ'।४०।

त्या तंतुकाने पुढे सद्गुरूंची सेवा करून आपले कर्मबंधन पूर्णपणे तोडून टाकले. द्वैताचे भय मागे टाकून निरतिशय परमानंदात निमग्न झाला.३६. अशा रीतीने नऊ भक्तींपैकी एका एका भक्तीनेही किती मुक्त झाले याची गणती नाही. दोन कवी श्रीगुरूंचे शिष्य झाले. श्रीगुरूंच्या लीला गाऊन कीर्तनभक्तीने ते मुक्त झाले.३७. अर्थात् ज्याचे गुण गाता गाता वेदही अचंबित झाले त्याच्या लीला पूर्णतया कोण सांगू शकेल?३८. नामधारक म्हणाला, 'महाराज, श्रीगुरूंच्या लीला गाणारे ते कोण शिष्यद्वय झाले ते ऐकण्यास मी सादर आहे. आपणच (३ऱ्या अध्यायांत) म्हणाल्याप्रमाणे वक्त्यालासुद्धा कथा आठवण्यासाठी प्रश्नाची अपेक्षा असते.'३९. सिद्धांनी सांगायला सुरुवात केली, 'एका नन्दी नावाच्या ब्राह्मणाला कुष्ठ झाले. त्याच्या परिहारासाठी त्याने तुळजापूरला देवीपुढे तीन वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा त्याला देवीने स्वप्नांत चंदला परमेश्वरीकडे जायला सांगितले.'४०.

**स चन्दलेश्वरीं प्राप्य सप्तमासं तपोऽतपत् । तयाप्युक्तं यतिं गच्छ स्थितं भीमामरायुतौ ।।४१।।**
**स प्राह तां गच्छ मर्त्यमिति वक्तुं न लज्जसे । परीक्षितं त ऐश्वर्यमियत्कष्टं कुतोऽर्पितम् ।।४२।।**
**इत्युक्त्वा स तपस्तेपे भक्तैर्देव्या स हापितः । यद्भव्यं तद्भवत्वेव कष्टमेतावदर्जितम् ।।४३।।**
**देव्याज्ञया तथैवाल्पं सह भोग्यमिति द्विजः । मत्वा स्वगतमानम्य देवीं भुक्तो ययौ यतिम् ।।४४।।**
**गन्धर्वपुरमासाद्य स यतिः क्वेत्यपृच्छत । पापं मत्वार्जुनाभं तं कुष्ठिनं नोत्तरं ददुः ।।४५।।**

सः चन्दल+ईश्वरीं प्राप्य सप्त+मासं तपः अतपत्। तया अपि उक्तं, 'भीमा+अमरा+युतौ स्थितं यतिं गच्छ।'४१। सः तां प्राह। 'मर्त्यं गच्छ इति वक्तुं न लज्जसे (किम्)? ते ऐश्वर्यं परीक्षितम्। इयत् कष्टं कुतः अर्पितम्?'४२। इति उक्त्वा सः तपः तेपे। देव्या भक्तैः सः हापितः। 'यत् भव्यं तत् भवतु एव। एतावत् कष्टं अर्जितम्।४३। देव्या आज्ञया तथा एव अल्पं सह भोग्यम्' इति स्वगतं मत्वा द्विजः देवीं आनम्य भुक्तः यतिं ययौ।४४। गन्धर्वपुरं आसाद्य सः 'यतिः क्व?' इति अपृच्छत। तं अर्जुन+आभं कुष्ठिनं पापं मत्वा उत्तरं न ददुः।४५।

देवीच्या आज्ञेप्रमाणे नन्दीने चंदला परमेश्वरीला जाऊन सात महिने तप केले. ईश्वरीनेही त्याला सांगितले की, 'भीमाअमरजा संगमावर संन्यासी आहेत. त्यांच्याकडे जा.'४१. त्यावर नन्दीने देवीला विचारले, 'मर्त्य मानवाकडे मला पाठवायला तुला लाज वाटत नाही का? बघितलं तुझ देवपण! हेच सांगायचे होते तर इतके कष्ट का दिलेस?'४२. असे बोलून त्याने पुन्हा देवीपुढे तप सुरू केले. तेव्हा देवीच्या भोप्यांनी त्याला देवीच्या आदेशाने देवळाबाहेर हाकलून दिले. मग त्याने विचार केला की 'जे व्हायचे होऊ दे. इतके कष्ट केलेत तर देवीच्या आज्ञेप्रमाणे आणखी एक वेळ प्रयत्न करून पाहू.' देवीला नैवेद्य करून पारणा केली आणि गाणगापुरास गेला.४४. तिथे जाऊन त्याने चौकशी केली की 'इथे संन्यासी कुठे आहेत?' पण त्याचे कुष्ठामुळे सर्वांग अर्जुन वृक्षासारखे पांढरे झालेले पाहून अशुभशंकेने कुणी त्याच्याशी बोलेना.४५.

**तं कश्चिदाह स्नात्वारं शिवरात्रिव्रतस्य च । पारणायै मठे देव आयास्यत्यत्र तिष्ठ भोः ।।४६।।**
**अत्रान्तरे प्रभुः प्राप मठं भक्तास्तमब्रुवन् । द्विजोऽर्जुनश्वेतदेह इदानीं कश्चिदागतः ।।४७।।**
**विश्वसाक्षी तमाहूय प्राह हित्वामरान्नरम् । आयातोऽसि कुतोऽर्हः किं दोषोत्थस्थास्नुरुग्हृतौ ।।४८।।**
**तच्छ्रुत्वा मत्कृतं ज्ञातमनेनैष न मानुषः । प्रत्यक्षः परमात्मेति मत्वोचे तं क्षमाप्य सः ।।४९।।**
**मूढोऽहं कुत्सितमतिः पापात्मा पापसम्भवः । शरण्यं त्वां प्रपन्नोऽस्मि दयाब्धिं भक्तवत्सलम् ।।५०।।**

कश्चित् तं आह, 'देव स्नात्वा शिवरात्रि+व्रतस्य पारणायै मठे आयास्यति। भोः अत्र तिष्ठ'।४६। अत्र+अन्तरे प्रभुः मठं प्राप। भक्ताः तं अब्रुवन्। 'इदानीं कश्चित् अर्जुन+श्वेत+देह द्विजः आगतः।'४७। विश्व+साक्षी तं आहूय प्राह, 'अमरान् हित्वा नरं कुतः आयातः असि? दोष+उत्थ+स्थास्नु+रुक्+हृतौ (नरः) अर्हः किम्?'४८। तत् श्रुत्वा, 'अनेन मत्+कृतं ज्ञातम्। एष न मानुषः, प्रत्यक्षः परमात्मा।' इति मत्वा सः तं क्षमाप्य।४९। 'अहं मूढः कुत्सित+मतिः पाप+आत्मा पाप+संभवः त्वां शरण्यं दया+अब्धिं भक्त+वत्सलं प्रपन्नः अस्मि।'५०।

कुणी तरी त्याला म्हणाले, 'गुरुदेव स्नानादि उरकून शिवरात्रीच्या पारण्यासाठी मठात येतील. तुम्ही इथेच थांबा.'४६. एवढ्यात प्रभू मठाला आलेच. भक्तांनी त्यांना सांगितले, 'आत्ता इथे एक अर्जुनाच्या झाडाप्रमाणे पांढरा शुभ्र ब्राह्मण आलेला आहे.' विश्वसाक्षी श्रीगुरूंनी त्याला बोलावून विचारले. 'देवाला सोडून माणसाकडे कसे आलात? दीर्घकाल स्थिरावलेल्या रोगाचा परिहार मर्त्य मानव करण्याला समर्थ असेल का?'४८. ते ऐकून नंदी चमकला. 'यांनी माझा इतिहास आणि माझे मन ओळखले. हे सामान्य मानव नाही. हे तर साक्षात् परमात्मा आहेत!' असा विचार करून त्याने त्यांची क्षमा मागितली.४९. तो म्हणाला, 'मी मूर्ख आहे, कुबुद्धी आहे, पापी आहे आणि पापापासूनच उपजलेला आहे. दयासागरा, भक्तवत्सला, आपणच योग्य आश्रय आहात असे जाणून मी आपल्याला शरण आलो आहे.'५०.

**मयि कुष्ठं समुत्पन्नं विवाहोर्ध्वं तदैव तु । पितृदारैरपि परि-त्यक्तं मां कोऽपि नेक्षते ॥५१॥**
**नाङ्गीकुर्वन्त्यपि सुरा भात्यतोऽपि मृतिर्वरम् । परात्मना त्वया नोचेत्स्वीकृतोऽत्र जहाम्यसून् ॥५२॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**मा भीः पापोत्थरोगोऽयमियत्कालमनेन तु । भुक्तं पापमतो भक्तिर्मयि जाताचलामला ॥५३॥**
**अत्रास्ते सङ्गमे तीर्थ-राजोऽघौघविनाशनः । तत्र स्नाहीति संभाष्य सोमनाथमथाब्रवीत् ॥५४॥**
**विधिवत्कारयित्वा षट्-कूलतीर्थे सचैलकम् । अश्वत्थमर्चयित्वा द्राक् सोमनाथामुमानय ॥५५॥**

'विवाह+ऊर्ध्वं मयि कुष्ठं समुत्पन्नम्। तदा एव तु पितृ+दारैः अपि मां परित्यक्तम्। मां कः अपि न ईक्षते।'५१। 'सुराः अपि न अङ्गीकुर्वन्ति। अतः मृतिः अपि वरं भाति। त्वया पर+आत्मना नो स्वीकृतः चेत् अत्र असून् जहामि'।५२। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अयं पाप+उत्थ+रोगः। इयत् कालं अनेन पापं भुक्तम्। अतः मयि अचला अमला भक्तिः जाता।५३। अत्र सङ्गमे अघ+ओघ+विनाशनः तीर्थ+राजः आस्ते। तत्र स्नाहि।' इति संभाष्य अथ सोमनाथं अब्रवीत्।५४। 'सोमनाथ, अमुं षट्कूलतीर्थे विधिवत् सचैलं (स्नानं) कारयित्वा, अश्वत्थं अर्चयित्वा द्राक् आनय।'५५।

नन्दी सांगू लागला, 'लग्नाच्या नंतरच मला हे कोड फुटले. त्याच वेळी माझे आईवडील आणि पत्नीनेही माझा त्याग केला. माझ्याकडे कुणी पाहातसुद्धा नाहीत'५१. 'माणसांचे सोडा, देवही मला उबगतात. ह्यापेक्षा मरण बरे असे वाटते. हे परमात्मा, आपण जर माझा अङ्गीकार केला नाही तर मी आता इथेच (प्रायोपवेशनाने) प्राणत्याग करीन.'५२. श्रीगुरू त्याला धीर देत म्हणाले, 'हा (पूर्वजन्मकृत) पापांतून उद्भवलेला रोग आहे. आता इतक्या दिवसात ते पाप भोगून झाले आहे. म्हणूनच तुला माझ्या ठिकाणी दृढ आणि शुद्ध भक्ती उपजली आहे.५३. 'इथे संगमावर पापांच्या राशींचा नाश करणारा तीर्थराज आहे. तिथे स्नान कर.' असे त्याला समजावून श्रीगुरू सोमनाथाला (गंगेचा पती) म्हणाले.५४. 'सोमनाथ, ह्याला संगमावर नेऊन षट्कूलांत विधिपूर्वक वस्त्रासहित स्नान करवा. तसेच अश्वत्थाची पूजाही याच्याकडून करून घ्या आणि इथे आणा.'५५.

**सोऽप्युक्तवत् कारयित्वा तमानीय गुरोः पदे । उपानयत्तमाहेशः पश्योत्तिष्ठाखिलं वपुः ।।५६।।**
**स्वर्णीभूतं स तु स्वाङ्गमुत्थायोद्वीक्ष्य विस्मितः । किञ्चित्कुष्ठाङ्किताष्ठीवद् गुरुं प्राञ्जलिरब्रवीत् ।।५७।।**
**भगवन्किं कृतं त्वेतत् कुष्ठं शिष्टं कुतोऽल्पकम् । तच्छ्रुत्वा सस्मितं प्राह त्वत्संशयफलं त्विदम् ।।५८।।**
**इत्याश्राव्य गुरोर्वाक्यं प्रणिपत्याब्रवीद्वचः । सुधाप्यम्बुधिया पीता मृतिं नयति किं दवः ।।५९।।**
**स्प्रष्टाऽवित्वाद्दहत्यल्पं स्वभावं परिहृत्य किम् । हरे स्वभावः पूर्णत्वं तवानेनैति किं वद ।।६०।।**

सः अपि उक्त+वत् कारयित्वा तं आनीय गुरोः पदे उपानयत्। तं ईशः आह, 'उत्तिष्ठ अखिलं वपुः पश्य।'५६। सः तु उत्थाय स्वर्णीभूतं स्वाङ्गं किञ्चित्+कुष्ठ+अङ्कित अष्ठी+वत् उद्वीक्ष्य विस्मितः प्राञ्जलिः गुरुं अब्रवीत्।५७। 'भगवन्, एतत् तु किं कृतम्? अल्पकं कुष्ठं कुतः शिष्टम्?' तत् श्रुत्वा सस्मितं (श्रीगुरुः) प्राह 'इदं त्वत्+संशय+फलम्।'५८। इति गुरोः वाक्यं श्रुत्वा प्रणिपत्य वचः अब्रवीत्। 'सुधा अम्बु+धिया पीता अपि मृतिं नयति किम्? दवः।५९। अवित्वात् स्प्रष्टा स्वभावं परिहृत्य अल्पं दहति किम्? हरे, तव स्वभावः अनेन पूर्णत्वं एति किम्? वद।'६०।

सोमनाथाने श्रीगुरूंच्या आदेशानुसार सर्व करून नन्दीला आणले आणि श्रीगुरूंसमोर उभे केले. त्याने साष्टांग नमस्कार केला. त्याला प्रभू म्हणाले, 'ऊठ, तुझे सर्व अंग नीट न्याहाळून पाहा.'५६. त्याने उठून आपले सर्व अंग निरोगी आणि सुवर्ण झालेले पाहिले; पण गुडघ्यावर किंचित् कोड राहिलेले दिसले.५७. तेव्हा तो काकुळतीने म्हणाला, 'भगवंता, हे आपण काय बरे केलेत? हे थोडेसेच कुष्ठ का शिल्लक ठेवलेत?' सद्गुरूंनी किंचित् स्मित केले आणि म्हणाले, 'अरे, हे तुझ्या संशयाचे फळ आहे!'५८. हे श्रीगुरूंचे वचन ऐकून नन्दी म्हणाला, 'हे पाणी आहे अशा समजुतीने अमृत प्याल्याने ते मृत्यूला कारण होईल का?'५९. 'अग्नीला अजाणता स्पर्श केला तर ते थोडे कमी भाजेल का? हे हरे, हा दोष अवशिष्ट राहिल्याने आपल्या स्वभावाला परिपूर्णता येईल का?' इथे **'हरे'** हे संबोधन हेतुपुरःसर आहे. पापाचे निर्मूलन करणारा तो हरी. हरीच्या नामात पापाचे निर्हरण करण्याची जितकी शक्ती आहे तेवढे पाप करण्याचे सामर्थ्य कुणाही पातक्याचे नाही (*नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी नरः।।* स्कंद पुराण, वैष्णव खंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३)६०.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**यद्भावो यादृशः क्वापि नान्यथा स्यात्स्वदोषतः । ग्रहीतुर्भात्यन्यथार्के जन्मान्धस्येव शून्यता ।।६१।।
मर्त्येन मम किं भूयादिति शङ्कोदिता त्वयि । तत्फलं त्विदमस्त्येकः प्रतीकारोऽत्र तं कुरु ।।६२।।
श्रुतिबृंहितया सिद्ध्येत् पुरुष्टुत्या त्वमर्त्यता । भविष्यत्यनया शुद्धिस् त्वं कृतार्थो भविष्यसि ।।६३।।
तच्छ्रुत्वा दीनवाग्लोलत्सर्वापघन आह तम् । स्वामिन् सर्वान्तरस्थस्त्वं किं वाच्यं तेऽग्रतः प्रभो ।।६४।।
लिपिमप्यक्षमो ज्ञातुं कथं स्तौमि पुरुष्टुत । अन्यत्किमपि कर्तुं मां यथास्वं विनियोजय ।।६५।।**

यत्+भावः यादृशः, न क्व अपि अन्यथा स्यात्। ग्रहीतुः स्वदोषतः जन्म+अन्धस्य अर्के शून्यता इव,अन्यथा भाति।६१। 'मर्त्येन मम किं भूयात्?' इति शङ्का त्वयि उदिता। इदं तु तत्+फलं अस्ति। अत्र एकः प्रतीकारः, तं कुरु।६२। श्रुति+बृंहितया पुरु+ष्टुत्या तु अमर्त्यता सिद्ध्येत। अनया शुद्धिः भविष्यति। त्वं कृत+अर्थः भविष्यसि।६३। तत् दीन+वाक् लोलत्+सर्व+अपघन तं आह। '(हे) स्वामिन् त्वं सर्व+अन्तर+स्थः। (हे) प्रभो, ते अग्रतः किं वाच्यम्?'६४। (हे) पुरुष्टुत, लिपिं अपि अक्षमः (अहं) कथं स्तौमि? किं अपि अन्यत् मां यथास्वं कर्तुं विनियोजय।६५।

ज्याचा जसा स्वभाव असतो तो कधीही वेगळा होत नाही. मात्र ग्राहकाच्या दोषामुळे वेगळा भासू शकतो. सूर्य स्वभावतः प्रकाशमान आहे. तो प्रकाशरहित कधीच होणार नाही. जन्मांधाला मात्र तो प्रकाश दिसू शकत नाही. हा त्याचा दोष आहे. न सूर्याचा न प्रकाशाचा.६१. तू इथे येतांना 'हा मर्त्य मानव माझा रोग काय दूर करील?' अशी शंका घेऊन आलास. हे त्याचेच फळ आहे. त्याला एक उपाय मी सांगतो तो कर.६२. उपनिषदांचा अर्थ विशद करणारी प्रगल्भ स्तुती कर. तिच्याद्वारा माझे तसेच तुझेही अमर्त्यत्व (ब्रह्मत्व) सिद्ध होईल. त्यायोगे तुझी शुद्धी होऊन तू कृतार्थ होशील.६३. तेव्हा श्रीगुरूंसमोर तो नंदी सर्वांगांनी लोळण घेत दीनवाण्या वाचेने म्हणाला, 'स्वामी, आपण सर्वांतर्यामी आहात. आपल्याला सांगायचे?'६४. 'आपली थोरामोठ्यांनी प्रगल्भ स्तुती केली आहे. मला धड लिहावाचायलाही येत नाही, मी कशी आपली स्तुती करणार? आपण दुसरे कांही मला झेपेल असे करायला सांगा.'६५.

**प्रभुः प्राह सकृद्वक्त्रान् निर्गतं न पुनर्वचः । ममान्तः प्रविशत्येव दन्तावलरदोपमम् ।।६६।।**
**उक्तमेव त्वया कार्यमित्युक्त्वा भस्म मन्त्रितम् । प्रक्षिप्य तन्मुखे प्राह स्तुहि नानाविधोक्तिभिः ।।६७।।**
**सोऽपि गीष्पतिवद्भूत्वा तं स्तोतुमुपचक्रमे । प्रेमगौरवनम्राङ्गो हर्षगद्गदया गिरा ।।६८।।**

प्रभुः प्राह। सकृत् मम वक्त्रात् निर्गतं वचः, दन्तावल+रद+उपमं, न एव पुनः अन्तः प्रविशति।६६। त्वया उक्तं एव कार्यम्। इति उक्त्वा मन्त्रितं भस्म तत्+मुखे प्रक्षिप्य आह, 'नानाविध उक्तिभिः स्तुहि।'६७। सः अपि गीष्पति+वत् भूत्वा प्रेम+गौरव+नम्र+अङ्गः हर्ष+गद्गदया गिरा स्तोतुं उपचक्रमे।६८।

प्रभू म्हणाले, 'माझ्या मुखातून एकदा बाहेर पडलेले वचन, हत्तीच्या सुळ्यांप्रमाणे, परत आत जात नाही.६६. तुला जे सांगितले आहे तेच करायला पाहिजे.' असे बोलून त्याला जवळ बोलावून श्रीगुरूंनी त्याच्या तोंडात अभिमंत्रण केलेले भस्म टाकले आणि म्हणाले, 'विविध वचनांनी माझी स्तुती कर.'६७. तो नन्दीही जणू बृहस्पतीसारखा वक्ता झाला. प्रेमभराने त्याचे अंग लवले आणि दाटलेल्या कंठाने त्याने स्तवनाला आरंभ केला.६८.

**आत्मा आणि ब्रह्म -** श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणेच तो उपनिषदांचा अर्थ स्पष्ट करणारी स्तुती करीत आहे. 'आपण **साक्षात्** - इंद्रियनिरपेक्ष अंतःस्थित असे **तत्त्व** आहात. मायेचे ईक्षण करणारे जगताचे **कर्ता** आहात. जीवमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार पोषण करणारे **भर्ता** आहात; नित्य तसेच अविनाशी आहात.' नित्य आणि अविनाशी तत्पद आपणच आहात तसेच त्वंपदवाच्य कर्ता आणि भर्ताही आहात. इथे अशी शंका घेतली की सांख्यांच्या प्रतिपादनानुसार, आत्मा असंग आहे. बुद्धीतच सर्व क्रियांचा उगम आहे. मग त्याला कर्ता कसे म्हणता येईल? बुद्धी हे जीवाचे करण (instrument) आहे. झाड तोडताना उपयोगात आणलेल्या कुऱ्हाडीला जसे कर्तत्व येत नाही तसेच बुद्धीलाही येत नाही. ब्रह्मसूत्रांतही (२:३:३३) लौकिक, वैदिक सर्व क्रियांचे कर्तृत्व जीवाचेच आहे. शास्त्रांच्या आज्ञासुद्धा जीवाला उद्देशूनच आहेत.

**साक्षात्तत्त्वमसीश त्वं कर्ता भर्ताव्ययो ध्रुवः । त्वं सर्वं खल्विदं ब्रह्मास्यात्मा साक्षी जगन्मयः ।।६९।।**
**धिया गुणैस्त्रिधाभूतात् स्वभेदात् सत्त्वलक्षणात् । भूतान्युद्भाव्य सर्वात्मन् विश्वं सृष्टं चराचरम् ।।७०।।**
**मायामयं ह्यस्वतन्त्रं वित्पात्रं कल्पितोऽत्र ना । सोऽपि त्वन्मायया भ्रान्तो भूत्वा संकल्पवान्सदा ।।७१।।**

(हे) ईश, त्वं साक्षात् तत्त्वं असि। कर्ता, भर्ता, ध्रुवः, अव्ययः (असि)। त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म आत्मा साक्षी जगत्+मयः असि।६९। धिया सत्त्व+लक्षणात् स्व+भेदात् गुणैः त्रिधाभूतात् भूतानि उद्भाव्य चराचरं विश्वं सृष्टम्।७०। माया+मयं हि अस्वतन्त्रं (विश्वम्)। अत्र वित्+पात्रं ना कल्पितः। सः अपि त्वत् मायया भ्रान्तः सदा सङ्कल्प+वान् भूत्वा,।७१।

'**तत्त्वमसि**' या महावाक्याचा उच्चार केल्यावर त्याच्या विचारासाठी शम आवश्यक आहे. म्हणून **सर्वं खल्विदं ब्रह्म** असा छांदोग्य उपनिषदांतील (३:१४:१) शमवाक्याचा निर्देश केला आहे. *तज्जलान् ज* म्हणजे जनकत्व, *ल* म्हणजे लयत्व आणि *अन्* अनन्यत्व यांच्यामुळे हे सर्व ब्रह्मच आहे. अशा ब्रह्मात रागद्वेषांचा संभवच असू शकत नाही. म्हणून त्याच्या उपासनाकाळात शांत राहावे. शांत राहून कशाचे चिंतन करावे? त्यासाठी सांगतात की व्यापक **आत्मा** चिंतनीय आहे. तो **साक्षी** म्हणचे द्रष्टा - पाहणारा आहे. तो काय पाहतो? तो हे सर्व दृश्य **जगत्** पाहतो, जे त्याच्याच अधिष्ठानावर स्थित आहे. त्याच्या सत्तेवाचून अन्य कोणतीच सत्ता नाही. म्हणून त्याला **जगन्मय** म्हटले आहे.६९.

**विश्वाची सृष्टी -** हे विश्वात्मन्, **धिया** म्हणजे जगताचे उपादान जी माया तिने युक्त अशा महत्तत्त्व नावाची समष्टी बुद्धी, तिच्यापासून सत्त्वप्रधान त्रिगुणांनी त्रिधा झालेल्या अहंकारापासून आकाशादि पंचमहाभूतांची कल्पना (रचना) केली आणि त्यांपासून हे विश्व निर्माण केले.७०.

**संसरण -** ह्या मायामय आणि परतंत्र विश्वात (आत्म)ज्ञानाची क्षमता असलेला मानव निर्माण केला. पण तोसुद्धा तुझ्या मायेला भुलून निरंतर संकल्पाच्या चक्रात सापडून,(७१)

**यात्यधो विस्मृतात्मा सत्-कर्मायत्तो वियोनिषु । भ्रमते भुक्तनिरयः कल्पेऽपि वासनाहृदा ।।७२।।**
**स्थित्वोद्भवति कल्पादौ प्राग्वत्सत्कर्मवानपि । गत्वोर्ध्वं पतति क्षीण-पुण्योऽधश्चन्द्रमण्डले ।।७३।।**
**ततोऽप्योषधिगो भूत्वा पुंसि रेतस्ततोऽप्यसौ । स्त्रीपुंयोगाच्छुक्ररक्त-मयो गर्भत्वमेत्यहो ।।७४।।**
**कललं प्राक् पञ्चरात्राद् बुद्बुदः सप्तरात्रतः । पेशी पक्षादर्बुदोऽथ भवति स्वस्थितो घनः ।।७५।।**

विस्मृत+आत्मा अधः याति। असत्+कर्म+आयत्तः भुक्त+निरयः वियोनिषु भ्रमते। कल्पे अपि वासना+हृदा।७२। स्थित्वा प्राक्+वत् सत्+कर्मवान् अपि ऊर्ध्वं गत्वा क्षीण+पुण्यः अधः चन्द्र+मण्डले पतति।७३। ततः अपि ओषधि+गः पुंसि रेतः ततः अपि असौ स्त्री+पुं+योगात् शुक्र+रक्त+मयः गर्भत्वं एति अहो। प्राक् कललं, पञ्चरात्रतः बुद्बुदः, सप्तरात्रतः पेशी, पक्षात् अर्बुदः स्वस्थितः घनः भवति।७५।

आपल्या स्वरूपाला विसरला. इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी ब्रह्मसूत्राच्या तिसऱ्या अध्यायातील प्रथम पादांत सहा अधिकरणांनी प्रतिपादलेल्या संसाराचे अनुसंधान करायला सांगितले आहे. ह्यात जीवाच्या देहांतरगमनाचे वर्णन आहे. आत्मविस्मृती झालेला हा जीव पापे करून नरक भोगतो आणि नंतर विविध योनीत फिरत राहतो. अंतःकरण वासनांनी व्याप्त असेपर्यंत तो कल्पांतापर्यंत भ्रमण करतो.७२. पुनः पुढच्या कल्पात तो पूर्वीच्याच वासना घेऊन जन्माला येतो. जर त्याच्याकडून पुण्यकर्मे झाली तर ऊर्ध्व गती लाभून तो स्वर्गात जाऊन पुण्यफळांचा भोग घेतो. ती पुण्याई संपली की परत चंद्रमंडलात पडतो.७३. चंद्रलोकापासून परतीचा, पर्जन्य, वनस्पती, पुरुषाचे रेत आणि स्त्रीचे रज हा क्रम वर सांगितला आहे. ह्या क्रमाला पंचाग्निक्रम असे नाव आहे. सूर्याच्या अग्नीत श्रद्धेचा हवि अर्पण करून सोमाची उत्पत्ती होते. वरुणाच्या अग्नीत सोमाचा हवि अर्पण करून पर्जन्याची उत्पत्ती होते. पृथ्वीच्या अग्नीत पर्जन्याचा हवि अर्पण करून अन्नाची उत्पत्ती होते. पुरुषाच्या अग्नीत अन्नाची आहुती घालून रेताची उत्पत्ती होते. आणि स्त्रीरूपी अग्नीत रेताची आहुती टाकल्याने गर्भाची उत्पत्ती होते. यापुढील श्लोकात केलेले गर्भधारणा आणि गर्भसंवर्धनाचे संक्षिप्त वर्णन बऱ्याच प्रमाणात आधुनिक गर्भवृद्धिशास्त्राशी जुळते.७४. क्रमाने शुक्र आणि शोणिताच्या संयोगाने झालेला हा गर्भ पहिल्या दिवशी कलल (amorphous), पाच रात्रीतून बुडबुडा, सात रात्रींनी अंडाकार, पंधरा दिवसांनी पिशवीसारखा होऊन षट्कोशांत स्थिरावतो आणि घन (viscid) होतो.७५.

**मासा क्रूरः शिरो द्वाभ्यां ग्रीवाद्यङ्गानि च त्रिभिः । चतुर्भिस्त्वग्रोमनखाः पञ्चभिः षड्भिरप्यथ ॥७६॥**
**नासास्याक्ष्यादिरन्ध्राणि सप्तभिश्चलनं च धीः । अष्टभिर्नवभिः पूर्णो देही भूत्वेश्वरं जगौ ॥७७॥**
**जातो मृतः शश्वदहं वियोनीर्-मयोषिता भक्तिपराङ्मुखेन ।**
**अवाङ्मुखं देव जरायुवीतं मामुद्धर त्रस्तमितो भजे त्वाम् ॥७८॥**
**एवं स्तुत्वा सूतिवायु-त्यक्तो विस्मृतलब्धधीः । रोरूयति जनुर्लब्ध्वा मोहितो माययेश ते ॥७९॥**
**अनभिप्रेतमापन्न आसनोत्थानचेष्टने । पराधीनतया भुङ्क्ते स व्यथां वक्तुमक्षमः ॥८०॥**

मासा क्रूरः, द्वाभ्यां शिरः, च त्रिभिः ग्रीवादि अङ्गानि, चतुर्भिः त्वक्, पञ्चभिः रोम+नखाः, अथ षड्भिः।७६। नासा, अक्षि आदि रन्ध्राणि, सप्तभिः चलनं, अष्टभिः धीः, नवभिः पूर्णः देही भूत्वा ईश्वरं जगौ।७७। अहं शश्वत् जातः, मृतः। मया भक्ति+पराक्+मुखेन वियोनीः उषिताः। (हे) देव, अवाक्+मुखं जरायु+वीतं त्रस्तं मां इतः उद्धर। त्वां भजे।७८। एवं स्तुत्वा सूति+वायु+त्यक्तः जनुः लब्ध्वा विस्मृत+लब्ध+धीः ते मायया मोहितः रोरूयति।७९। वक्तुं असमर्थः पर+अधीन+तया आसन+उत्थान+चेष्टने अन्+अभिप्रेतं आपन्नःसः व्यथां भुङ्क्ते।८०।

एका महिन्यात त्याला काठिण्य येते, दोन महिन्यांत मस्तक, तीन महिन्यांत गळा इत्यादि अवयव, चार महिन्यांनी त्वचा, पाच महिन्यांनी रोम आणि नखे, सहा महिन्यांत(७६) नाक, डोळे इत्यादि छिद्रे, सात महिन्यांत हालचाल, आठ महिन्यांत पूर्वसंस्कारांनी युक्त निश्चयात्मिका बुद्धी प्राप्त होऊन नऊ महिन्यांत तो सर्वांगपरिपूर्ण देह धारण करतो आणि ईश्वराची प्रार्थना करतो.७७. 'देवा, मी तुझ्या भक्तीकडे पाठ फिरवून किती वेळा तरी जन्मलो आणि किती तरी वेळा मरण पावलो. नाना नाना योनींत कष्ट भोगले. आता मी खाली तोंड करून ह्या जारांत गुंडाळलेला गर्भाशयात त्रासून गेलो आहे. इथून माझी सुटका कर. मी तुझी भक्ती करीन.'७८. अशी स्तुती करून तो प्रसूतीच्या वायूद्वारा गर्भाशयातून बाहेर ढकलला जातो. जन्म झाल्याबरोबर त्याला आधी मिळालेली बुद्धी विसरून जातो आणि तुझ्या मायेच्या भुलीने रडायला लागतो.७९.

**ततोऽपि क्रीडनासक्तो वयस्यैरज्ञभावगः । तारुण्ये विषयासक्तो मत्तो दुर्जनसङ्गतः ।।८१।।**
**देवमायां स्त्रियं प्रेक्ष्य तद्भावैरजितेन्द्रियः । भोगोत्सुकः खलोऽज्ञात-कार्याकार्यो दुरध्वगः ।।८२।।**
**वार्धक्ये स्वजनत्रस्तो रुग्णोऽस्वस्थो जराकृशः । श्वासकासकफाविष्टः सम्भवत्यजितेन्द्रियः ।।८३।।**
**शतायुरपि रात्र्यार्धं हृतं शिष्टमपीदृशम् । कथंकारं नृजन्मापि श्रेष्ठं भक्त्या विना त्वयि ।।८४।।**

ततः अपि अज्ञ+भाव+गः वयस्यैः क्रीडन+आसक्तः। तारुण्ये विषय+आसक्तः मत्तः दुर्जन+सङ्गतः।८१। अजित+इन्द्रियः देव+मायां स्त्रियं प्रेक्ष्य तत्+भावैः भोग+उत्सुकः खलः अज्ञात+कार्य+अकार्यः दुः+अध्वगः।८२। वार्धक्ये स्वजन+त्रस्तः रुग्णः अस्वस्थः, अजित+इन्द्रियः श्वास+कास+कफ+आविष्टः संभवति।८३। शतायुः अपि रात्र्या अर्धं हृतम्। शिष्टं अपि ईदृशम्। नृजन्म अपि त्वयि भक्त्या विना कथंकारं श्रेष्ठम्।८४।

त्या नवजात तान्ह्याला आपल्याला काय हवे नको ते बोलताही येत नाही. उठणे, बसणे, चालणे या सर्व गोष्टींत तो पराधीन असतो. त्याला हवे असते एक आणि मिळते भलतेच. अशा अवस्थेत होणाऱ्या व्यथा तो भोगीत असतो.८०. त्यानंतर बाल्यावस्थेत तो अजाणच असतो. सवंगड्यांबरोबर खेळण्यातच मग्न असतो. तारुण्यात विषयांची अनिवार ओढ, धनजनाची मस्ती, दुर्जनांची संगती,(८१) इंद्रियवशता यांमुळे ईश्वरी मायेचेच रूप असलेल्या स्त्रियांना पाहून भोगाच्या लालसेने पेटलेला असतो. अशा रीतीने त्याचा कार्य आणि अकार्य यांचा विवेकही नष्ट होतो आणि तो वाकड्या मार्गाला लागतो.८२. म्हातारपणी आपलेच म्हणवणारे त्याला त्रासून टाकतात. रोग आणि अस्वस्थता त्याचा जीव नकोसा करतात. इंद्रियांवर ताबा नसतोच. त्यामुळे दमा, खोकला, कफ यांचा प्रादुर्भाव होतो.८३. माणसाचे आयुष्य अगदी शंभर वर्षे धरले तरीही रात्री झोपण्यातच निम्मे निघून जाते. उरलेल्याचीही गती ही अशी होते. हा मनुष्यजन्म शास्त्रांनी आणि पुराणांनी नावाजलेला असला तरी देवा, तुझ्या भक्तीवाचून तो कसा श्रेष्ठत्वाला पोचेल?८४.

**तत्साफल्यं नवविध-त्वद्भक्त्यासक्तसङ्गतिः । त्वयि भक्तिः साधने द्वे त्वां याचे भक्तवत्सल ।।८५।।**
**भो जनात्रावतीर्णोऽयं सद्धर्मत्राणकारणः । परमात्मा परं ब्रह्म लीलाधाम्नैष नो नरः ।।८६।।**
**सेव्यताममृतत्वाय योगैर्वा श्रवणादिना । भजतोऽनुभजत्येष भगवान् भक्तिभावनः ।।८७।।**
**यथा तृणौघोऽग्निस्पर्शाद् भस्मसाज्जायते तथा । निःशेषाघं कृपांशेन निर्दग्धं मेऽमुना तथा ।।८८।।**
**भगवन् कति ते वाच्या वाङ्मनोऽविषया गुणाः । श्रुत्या नेतीति सिद्धेपि श्रद्धावद्योगिगोचर ।।८९।।**

(हे) भक्तवत्सल, तत्+साफल्यं नवविध+त्वत्+भक्ति+आसक्त+सङ्गतिः (च) त्वयि भक्तिः द्वे साधने त्वां याचे।८५। 'भो जनाः। अयं परं+आत्मा परं ब्रह्म, लीला+धाम्ना सत्+धर्म+त्राण+कारणः अत्र अवतीर्णः। एष नो नरः।८६। योगैः वा श्रवणादिना (भवद्भिः) सेव्यताम्। एष भक्तिभावनः भजतः अनुभजति।८७। यथा तृण+ओघः अग्नि+स्पर्शात् भस्मसात् जायते तथा अमुना कृपा+अंशेन मे निःशेष+अघं निर्दग्धम्'।८८। '(हे) भगवन्! (हे) श्रद्धावत्+योगि+गोचर, श्रुत्या 'न इति' इति सिद्धे अपि (ते रूपे) ते वाक्+मनः+ अविषयाः गुणाः कति वाच्या?'।८९।

भक्तांच्या जिवलगा, त्या नरजन्माचे सार्थक, तुझे श्रवण, कीर्तन, स्मरण, सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि तुला आत्मनिवेदन अशा नवविध भक्तीत रंगलेल्यांची संगती (१) आणि तुझी भक्ति (२) हीच दोन साधने आहेत. ती मला लाभोत हीच याचना तुझ्या चरणी करीत आहे.८५.

'लोक हो! ह्या श्रीगुरूंना सामान्य माणूस असे समजू नका. हा साक्षात् परमात्मा आहे. अतीव प्रेमास्पद असल्याने हाच परब्रह्मही आहे. हा साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी लीलादेह धारण करून आला आहे. (ह्या विशेषणांनी त्यांच्या अवताराचे प्रयोजन आकार घेण्याचे कारणही सांगितले आहे.)८६. म्हणून सर्वांना माझे सांगणे आहे की अष्टांगयोगाने, निष्काम कर्मयोगाने किंवा श्रवणादि भक्तीने याची उपासना करा. कारण हा भक्तिभावन आहे; भजन करणाऱ्यांवर अनुग्रह करणारा आहे. *भजन* याचा अर्थ *निरंतर स्मरण, अनुसंधान.* भ.पू. पा. शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र भाष्यात म्हटल्याप्रमाणे 'दूरदेशी गेलेल्या पतीचे ज्या उत्कंठेने पत्नी स्मरण करते,'

**इत्यादिना बहु स्तुत्वा पदोः प्रणिपपात सः । शिष्टं कुष्ठं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः ।।९०।।**
**तत्रैव स्थापयामास तं दत्त्वेष्टं वरं प्रभुः । सोऽप्यानीय वधूं स्थित्वा व्यरचद्विविधाः कथाः ।।९१।।**

इति आदिना सः पदोः प्रणिपपात। तदा शिष्टं कुष्ठं विशिष्ट+इष्ट+सुतष्टितः नष्टम्।९०। तं इष्टं वरं दत्वा प्रभुः तत्र एव स्थापयामास। सः अपि वधूं आनीय स्थित्वा विविधाः कथाः व्यरचत्।९१।

तीच उत्कंठा इथे अभिप्रेत आहे. भक्तिशास्त्रमय बुद्धीने ईश्वराशी तादात्म्य पावलेल्या अभिमानाने भक्तिविषयात दीर्घकाल स्थिरावणे ह्यालाच उपासना असे नाव आहे. ह्या तादात्म्यावस्थेतूनच आनंद प्रकटतो. 'समाधीने सर्व चित्ताचे मल धुवून टाकल्यावर आत्म्यांत प्रविष्ट झाल्याने जे सुख होते ते अंतःकरणातच भोगता येते, वाणीने वर्णन करण्याजोगे नाही' असे पंचदशीत (११:११८) म्हटले आहे ते याच अर्थाने (*समाधिर्निर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत्। न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते।।*).८७. 'गवताची बनीम आगीच्या एका ठिणगीने जळून जावी तसे माझ्या पापाचे डोंगर ह्या श्रीगुरूंच्या कृपालेशाने निःशेष भस्मसात् केले आहेत.'८८. या श्लोकात श्रद्धावान् योग्यांच्याच दृष्टी पडणारा असे संबोधन हेतुगर्भ आहे. वेदांनी सुद्धा 'स्थूल नाही, अणु नाही', 'नाही नाही, असे नाही' असा निर्णय केलेले मन-वाणीला अगोचर असे तुझे गुण किती म्हणून गावेत?'८९ अशा प्रकारे नानाविध स्तोत्रांनी श्रीगुरूंचे स्तवन करून नन्दीने त्यांच्या चरणांवर दंडवत घातला. तेव्हा विशेष विद्वानांनाच इष्ट असणारा तो श्रीगुरुनाथ प्रसन्न झाला आणि त्या नंदीचे उरलेसुरले कोडही नाहीसे झाले. मनुस्मृतीत शिष्ट शब्दाची व्याख्या 'ज्यांनी वेद आणि वेदांगाचा धर्मानुसार अभ्यास केला ते ब्राह्मण' अशी केली आहे (*धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः। ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः।।* १२.१०९।।).९०.

त्याला हवा असलेला वर देऊन नृसिंहप्रभूंनी तिथे गाणगापुरांतच त्याना राहवून घेतले. नन्दीही आपल्या कुटुंबाला घेऊन तिथे स्थायिक झाला आणि श्रीगुरूंच्या स्तवनपर अशी काव्ये केली.९१.

**कवितां प्रसृतां लोके तस्य ज्ञात्वा नृकेसरी । कश्चित्कविरमंस्तेयं गर्ह्योदारापि नृस्तुतिः ।।९२।।**
**तद्ग्रामे केनचिन्नीतो गुरुस्तस्मै व्यदर्शयत् । उपास्यकल्लेशलिङ्गस्थं स्वं रूपं हृदर्चने ।।९३।।**
**पञ्चभिस्तं नवैः श्लोकैर् नित्यवन्मानसार्चने । स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह क्वास्ते कल्लेश्वरो वद ।।९४।।**
**तच्छ्रुत्वा स तदा ध्यानं विसृज्य भगवान्स्वयम् । नृरूपेणावतीर्णोऽयमिति मत्वान्वगाद्गुरुम् ।।९५।।**

तस्य कवितां लोके प्रसृताम्। ज्ञात्वा कश्चित् नृकेसरी कविः उदारा अपि अयं नृ+स्तुतिः गर्ह्या अमंस्त।९२। तत् ग्रामे केनचित् नीता गुरुः तस्मै उपास्य+कल्लेश+लिङ्ग+स्थं स्वं रूपं हृत्+अर्चने व्यदर्शयत्।९३। नित्यवत् मानस+अर्चने पञ्चभिः नवैः श्लोकैः स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह। 'ते कल्लेश्वर क्व आस्तेः? वद।'९४। तत् श्रुत्वा सः तदा ध्यानं विसृज्य 'अयं स्वयं भगवान् नृरूपेण अवतीर्णः,' इति मत्वा गुरुं अन्वगात्।९५।

त्याची कविता सर्व लोकात प्रसार पावली. नरकेसरी नावाच्या एका कवीच्या कानांवर त्या कविता पडल्या. 'कविता चांगल्या आहेत त्या मानवाच्या स्तुतीपर असल्याने निंद्यच आहेत,' असा विचार त्याच्या मनात आला.९२. एकदा कुणी भक्ताने श्रीगुरूंना नरकेसरीच्या गावी आणले असता तो आपल्या नित्यनेमानुसार कल्लेश्वराची पूजा करीत होता. त्या वेळी त्याला कल्लेश्वराच्या जागी श्रीगुरूच दिसू लागले.९३. रोजच्या नियमानुसार मानसपूजेत पाच नवीन रचलेल्या श्लोकांनी त्याने स्तुती केली. तेव्हा श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे, तुझा कल्लेश्वर कुठे आहे? सांग!'९४. ते ऐकून नरकेसरीने ध्यान विसर्जित केले आणि 'हे तर प्रत्यक्ष भगवंतच मानवरूपाने अवतरले आहेत,' असा निश्चय करून तो श्रीगुरूंकडे निघाला.९५.

**नृकेसरिर्गुरुं प्राप्य रचितैः पञ्चभिः शुभैः । श्लोकैस्तुष्टाव तं प्राह हित्वेशं स्तौषि किं नरम् ।।९६।।**

**।। नरकेसर्युवाच ।।**

**भवान्मयाज्ञभावेन मानुषो लौकिको मतः । कृपयापास्य मेऽज्ञानं सत्त्वं रूपं प्रदर्शितम् ।।९७।।**
**तेन नष्टोऽद्य मे मोहस्त्वत्प्रसादाज्जनार्दन । प्राक्पुण्यं फलितं मेऽदः शिष्यालौ मां नियोजय ।।९८।।**
**भगवानपि सुप्रीतस् तस्मै दत्वांशुकं वरम् । प्राह कल्लेश्वरं विप्र भज तत्रापि मत्स्थितिः ।।९९।।**
**स प्राह भगवन्तेऽदः प्रत्यक्षं रूपमुत्तमम् । हित्वोत्सहे न गन्तुं मां त्वत्पादाब्जे स्थिरीकुरु ।।१००।।**

नृकेसरिः गुरुं प्राप्य पञ्चभिः शुभैः रचितैः श्लोकैः तुष्टाव। तं प्राह 'ईशं हित्वा नरं स्तौषि किम्?'९६। नरकेसरि उवाच। 'मया अज्ञ+भावेन भवान् लौकिकः मानुषः मतः। कृपया मे अज्ञानं अपास्य सत्त्वं रूपं प्रदर्शितम्।९७। (हे) जनार्दन, तेन त्वत् प्रसादात् मे मोहः नष्टः। अदः मे प्राक् पुण्यं फलितम्। मां शिष्य+आलौ नियोजय।'९८। भगवान् अपि सुप्रीतः तस्मै वरं अंशुकं दत्वा प्राह, '(हे) विप्र, कल्लेश्वरं भज। तत्र अपि मत्+स्थितिः।'९९। सः प्राह। '(हे) भगवन्त, इदं प्रत्यक्षं उत्तमं रूपं हित्वा गन्तुं न उत्सहे। त्वत्+पाद+अब्जे स्थिरीकुरु'।१००।

नरकेसरीने श्रीगुरूंच्याकडे येऊन त्यांची आपण रचलेल्या पाच श्लोकांनी स्तुती केली. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे ईश्वराला सोडून मानवाची काय स्तुती करतोस?'९६. नरकेसरी उत्तरला, 'देवा, मी अज्ञानवश आपल्याला लौकिक माणूसच समजलो. आपणच कृपेने माझे अज्ञान निरसून सात्त्विक ज्ञानमय रूप दाखविले आहे.'९७. 'जनार्दना, त्या तुझ्या कृपाप्रसादाने माझा मोह नष्ट झाला आहे. हे माझे पूर्वपुण्यच फळाला आले आहे. मला आता आपण आपल्या शिष्यपंक्तीत मिळवून घ्यावे.'९८. भगवान् श्रीगुरूंनी प्रसन्न होऊन त्याला प्रीतीपूर्वक उत्तम वस्त्र दिले आणि म्हणाले, 'कल्लेश्वराचीच उपासना कर. त्यातही माझेच अस्तित्व आहे.'९९. नरकेसरी म्हणाला, 'आपले हे प्रत्यक्ष उत्कृष्ट रूप सोडून मला कुठेही जावेसे वाटत नाही. मला आपल्या पदकमलातच स्थिर करा!'१००.

**मद्धाम्न्याप्तोऽस्यनायासाद् भगवन् भक्तकामधुक् । दयाब्धे मा कुरूपेक्षां दयनीयतमस्य मे ।।१०१।।**
**इत्युक्त्वा स पपाताग्रे तमाश्वास्य दयानिधिः । शिष्यत्वेनोररीकृत्य स्वात्मसौख्यमुपादिशत् ।।१०२।।**
**एवं भूत्वा कवी द्वौ तौ संग्रथ्य हरिसत्कथाः । तत्कीर्तनाच्छ्रद्धयात्र कृतकृत्यौ बभूवतुः ।।१०३।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ।।**

**आदितः एकविंशोऽध्यायः ।। सप्ताहपारायणे षष्ठः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

'(हे) भक्त+काम+धुक् भगवन् अन+आयासात् मत्+धाम्नि आप्तः असि। (हे) दया+अब्धे, मे दयनीय+तमस्य उपेक्षां मा कुरु।'१०१। इति उक्त्वा सः अग्रे पपात। दयानिधिः तं आश्वास्य, शिष्यत्वेन उरीकृत्य स्व+आत्म+सौख्यं उपादिशत्।१०२। एवं तौ द्वौ कवी भूत्वा हरि+सत्+कथा संग्रथ्य श्रद्धया तत् कीर्तनात् कृतकृत्यौ बभूवतुः।१०३।

भगवंता, भक्ताची जणू कामधेनु असे आपण अनायासच माझ्या दारी आलेला आहात. दयासागरा, ह्या अतीव दयनीय अशा माझी उपेक्षा करू नका.१०१. असे बोलून त्या नरकेसरीने श्रीगुरूंच्या चरणी आपले शरीर झोकून दिले. तेव्हा श्रीगुरूंनी त्याला आश्वासन देऊन त्याचा शिष्य म्हणून स्वीकार केला आणि त्याला स्वात्मसौख्याचा उपदेश केला.१०२. असे हे दोन कवी होऊन गेले. श्रीगुरूंच्या पावन लीला त्यांनी ग्रथित केल्या आणि श्रद्धापूर्वक त्यांच्या कीर्तनाने ते कृतकृत्य झाले.१०३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा तिसरा आणि प्रथमपासून एकविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ द्वाविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**श्रुतो गुणानुवादोऽपि हरेस्तृप्तिर्न मे गुरोः । अतीव वर्धते तृष्णा शश्वच्छ्रवणपानतः ।।१।।**
**भवाननलसो नूनमुदारतम एव मे । पूर्वश्रेयःप्रभावेन सङ्गतोऽस्ति कृपाकरः ।।२।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**गुणानुवादक्षीराब्धेः कति पासि कथामृतम् । सच्चित्सुखस्य लीलानुरनन्तस्य परात्मनः ।।३।।**

नामधारक उवाच। हरेः गुरोः गुण+अनुवादः श्रुतः अपि मे तृप्तिः न। श्रवण+पानतः शश्वत् अतीव तृष्णा वर्धते।१। मे पूर्व+श्रेय+प्रभावेन भवान् अन्+अलसः उदार+तमः कृपा+करः सङ्गतः अस्ति।२। सिद्ध उवाच। सत्+चित्+सुखस्य नुः लीला+ अनन्तस्य परात्मनः गुण+अनुवाद+क्षीर+अब्धेः कथा+अमृतं कति पासि?३।

श्रीगणेशाय नमः। *बाविसीं आठ तनू धरुनि। आठहि गांवी दिवाळी करुनी। शूद्रशेती अमाप पिकवुनि। गाणगापुरची तीर्थे प्रकटविली।।१।।* नामधारक म्हणतात, 'आपल्या मुखातून इतका काळ पापतापहर श्रीगुरूंच्या गुणामृताचे कर्णाद्वारे सतत पान करूनही माझी तृप्ती कांही होतच नाही. उलट त्या अमृतपानाची तृष्णा वाढतच आहे.'१. 'आपल्यासारखा कृपाळू, दातार, निरलस वक्ता मला लाभला ही माझी पूर्वपुण्याईचा फळाला आली आहे!'२. सिद्ध म्हणतात, 'सच्चिदानंद, अनंत, परमात्म्याने मायामानुष रूपाने केलेल्या लीलांच्या गुणानुवादाच्या क्षीरसागरातले कितीसे कथारूपी अमृत तू पिऊ शकशील?' त्या कथामृताचे निःशेष पान तूच काय पण कुणीच करू शकणार नाही, असा त्यांचा अभिप्राय आहे. इथे सिद्धमुनींनी श्रीगुरूंचे परब्रह्मत्व निर्देशिले आहे.३.

**गुणान्कात्स्न्र्येन वक्तुं न क्षमः कोऽपीशितुस्त्वहम् । उच्चावचखगोड्डान-न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।४।।**
**स भीमामरजातीर-विहारी भक्तवत्सलः । भक्ताधीनत्वमाश्रित्य सदाभूत्तन्मतानुगः ।।५।।**
**निराकारो निरीहोऽपि शुद्धसत्त्वस्वरूप्यजः । बुद्ध्या सङ्गत्य लीलार्थं स्वयं विश्वात्मकोऽभवत् ।।६।।**
**सर्वत्र स्थितिमांस्त्वेष पश्येयुर्मुनयो हि माम् । इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः ।।७।।**

कः अपि गुणान् कात्स्र्येन वक्तुं न क्षमः। अहं तु उच्च+अवच+खग+उड्डान+न्यायेन यथामति वक्ष्ये।४। सः भीमा+अमरजा+तीर+विहारी भक्तवत्सलः भक्त+अधीनत्वं आश्रित्य सदा तत्+मत+अनुगः अभूत्।५। निः+आकारः निः+ईहः शुद्ध+सत्त्व+स्वरूपी अजः अपि स्वयं लीला+अर्थं बुद्ध्या सङ्गत्य विश्व+आत्मकः अभवत्।६। एष तु सर्वत्र स्थिति+मान्, 'मां मुनयः पश्येयुः' इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः।७।

त्याचप्रमाणे त्या भगवद्गुणांचे वर्णन पूर्णपणे करणे कुणालाही शक्य नाही. अनंत आकाशात आपापल्या शक्त्यनुसार कमी अधिक उंचीची झेप घेणाऱ्या पक्षांप्रमाणे मी यथामती सांगत आहे.'४. 'भीमा आणि अमरजा यांच्या तीरावर भक्तांच्या उद्धाराची लीला करणारा तो भक्तवत्सल श्रीगुरू भक्तांच्या अधीन होऊन नेहमी त्यांच्या मतानुसार वागत असे.'५. सद्गुरू भगवान् भक्तांच्या मर्जीने वागतात तर त्यांना साकार म्हणावे की निराकार? या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मसूत्रानुसार (३ः२ः११) असेच द्यावे लागेल की ते न तर साकार आहे न निराकार. तत्त्वतः अरूपच आहे. साकार वा निराकार रूपाची कल्पना उपासनेच्या संदर्भात केली जाते. असे हे अरूप, संकल्परहित, शुद्धसत्त्वस्वरूप, निर्विकार परब्रह्म लीलेसाठी म्हणून महत्तत्त्वाशी मिळून विश्वात्मक झाले.६. सनकादिक मुनींना दृग्गोचर होण्यासाठी त्यांनी ब्रह्मा, विष्णू, महेश ही तीन रूपे धारण केली आणि सत्य, वैकुंठ आणि कैलास या तीन लोकांत राहिले.७.

**तत्रापि भुवि मे भक्ता भूयांसो मन्मयास्त्वहम् । तेषामगोचरोऽस्म्यस्मात् स्थेयं तत्रेत्यमंस्त सः ।।८।।**
**ततोऽत्र भगवान् भूमौ लीलाधाम्ना युगे युगे । भजतोऽनुभजत्येष श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।९।।**
**किं वर्ण्यते भगवतो भक्तवात्सल्यमद्भुतम् । परिपूर्णोऽपि सन्तृप्तो भोक्तुं भ्रमति तद्गृहे ।।१०।।**
**अन्या अपि तु तल्लीलास् तादृश्यः सन्त्यनन्तशः । स्वकृते तु न ता विद्धि भक्तानुग्रहलक्षणाः ।।११।।**
**कलौ घोरेऽत्र नो भाग्यमुदितं हि युगे युगे । दुर्लभस्तपसापीशः स्मृत्यैव सुलभोऽत्र नुः ।।१२।।**

तत्र अपि 'भुवि मे मन्मया भक्ताः भूयांसः। अहं तु तेषां अगोचरः अस्मि। अस्मात् तत्र स्थेयं' इति सः अमंस्त।८। ततः भगवान् अत्र भूमौ युगे युगे लीला+धाम्ना (अवतीर्य) भजतः अनुभजति। एष प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।९। भगवतः अद्भुतं भक्तवात्सल्यं किं उ वर्ण्यते? परिपूर्णः संतृप्तः अपि तत् गृहे भोक्तुं भ्रमति।१०। तादृश्यः अन्या अपि तु तत्+लीलाः अनन्तशः सन्ति। ता न तु स्व+कृते, भक्त+अनुग्रह+लक्षणाः विद्धि।११। अत्र घोरे कलौ नः भाग्यं हि उदितम्। युगे युगे तपसा अपि दुर्लभः ईशः अत्र नुः स्मृत्या एव सुलभः।१२।

त्यातही 'भूलोकात माझे किती तरी मन्मय झालेले भक्त आहेत त्यांना मात्र माझे दर्शन होत नाही, तिथेही मला जायला पाहिजे' अशी करुणा त्यांच्या मनांत उपजली.८. तेवढ्यासाठी भगवंत ह्या भूलोकावर लीलादेह धारण करून युगांयुगांतून अवतरून आपल्या भक्तावर अनुग्रह करीत असतो. कारण याला श्रद्धा आणि भक्ती फार आवडतात.९. या भगवंताचे भक्तवात्सल्य किती म्हणून वानावे? हा स्वयं परिपूर्ण आहे आणि सदैव तृप्त आहे. तरीही त्या भक्तांच्या दारोदार भिक्षेच्या निमित्ताने हिंडत असतो!१०. 'अशाच त्या प्रभूच्या अगणित लीला आहेत. पण त्या सर्वही तो स्वतःसाठी नव्हे तर भक्तांवर अनुग्रह करण्याच्या हेतूनेच करतो हे ध्यानात ठेव.११. ह्या घोर कलियुगात आपले भाग्य खरेच उगवले आहे; इतर युगात तपादि सायासांनीसुद्धा दुर्लभ असलेला हा ईश्वर मानवांना केवळ स्मरणमात्रे सुलभ झाला आहे.'१२.

**स एष भगवांस्तत्र भक्ताधीनतयान्वहम् । निमन्त्रितो भक्तगेहे भिक्षान्नं बुभुजे प्रभुः ॥१३॥**
**दीपावल्युत्सवे सप्त प्रिया भक्ता जगद्गुरुम् । स्वे स्वे गृहे नेतुकामा भिन्नवासाः समाययुः ॥१४॥**
**भवन्तं नेतुकामोऽद्य दीपाल्यां पञ्चवासरम् । प्राप्तोऽस्म्यद्यैव गन्तव्यमित्येकैकोऽब्रवीद् गुरुम् ॥१५॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**यूयं सप्तैक एवाहमेककालीन उत्सवे । सप्तग्रामेष्वेकदैव कथं मे गमनं भवेत् ॥१६॥**
**एकत्रैकैकघस्ने वा गतिरेकैकसद्मनि । सम्भवेच्चेत्कृतं तद्वद् भवद्भिर्मे वरं द्विजाः ॥१७॥**
**भक्ताधीनोऽस्मि मां यो यो नयेद्यास्यामि तत्र च । तच्छ्रुत्वान्योन्यं कलहं चक्रुर्नेष्याम्यहं त्विति ॥१८॥**

सः एष भगवान् प्रभुः तत्र भक्त+अधीनतया अनु+अहं भक्त+गेहे निमन्त्रितःभिक्षा+अन्नं बुभुजे।१३। सप्त प्रियाः भिन्न+वासाः भक्ताः दीपावलि+उत्सवे स्वे स्वे गृहे नेतु+कामाः समाययुः।१४। एक+एकः गुरुं अब्रवीत्। 'अद्य भवन्तं दीपाल्यां पञ्चवासरं नेतु+कामः प्राप्तः अस्मि। अद्य एव गन्तव्यम्।'१५। श्रीगुरुः उवाच। 'यूयं सप्त, एक एव अहं, एक+कालीन उत्सवे सप्त+ग्रामेषु एकदा एव मे गमनं कथं भवेत्?१६। एकत्र, एक+एक+सद्मनि एक+एक+घस्ने वा गतिः सम्भवेत्। (हे) द्विजाः, भवद्भिः तत्+वत् कृतं चेत् मे वरम्।'१७। भक्त+अधीनः अस्मि। यः यः मां नयेत् तत्र च यास्यामि। तत् श्रुत्वा अन्यः अन्यं 'अहं तु नेष्यामि' इति कलहं चक्रुः।१८।

तोच हा भगवंत त्या गाणगापुरात भक्तपराधीन होऊन रोज ज्याचे आमंत्रण असेल त्या भक्ताच्या भिक्षेचे अन्न तो प्रभू जेवत असे.१३. एका दिवाळीच्या सणाला सात वेगवेगळ्या गावचे सात प्रिय भक्त जगद्गुरूंना आपापल्या घरी घेऊन जाण्याच्या इच्छेने आले.१४. प्रत्येक जण येऊन श्रीगुरूंना म्हणू लागला, 'महाराज, आज मी आपल्याला दिवाळीचे पाच दिवस आमच्या घरी नेण्यासाठी आलो आहे. आजच निघायला हवे!' श्रीगुरूंनी सर्वांना समजावले, 'हे पाहा, तुम्ही सात जण आहा आणि मी तर एकटाच आहे. एकाच वेळी दिवाळीसाठी सात गावी जाणे कसे शक्य आहे?१६. एक तर तुम्ही सगळे दिवाळी एकत्रच करा किंवा मी एकेका दिवशी एकेकाच्या घरी जाईन. अशी कांही योजना तुम्ही कराल तर मला बरे वाटेल.१७. 'मी केवळ भक्तपराधीन आहे. जो माझा भक्त जिथे कुठे मला घेऊन जाईल तिथे मी येईन.' श्रीगुरूंचे बोलणे ऐकून सगळे आपापसात 'श्रीगुरूंना मीच नेणार' 'नाही मीच नेणार' असे वादू लागले.१८.

**निःस्वो धनीति द्वैतान्मां मा पाहि ह्यसि भो समः । भूतमात्रेऽत एहीति प्रोक्त्वा ते पतिताः पुरः ।।१९।।**
**निवार्य तान्सर्वगृहानेष्यामीत्युदितेऽपि ते । कैर्विश्वस्तव्यमित्यूचुर्भ्रान्ताः श्रीगुरुमीश्वरम् ।।२०।।**
**भगवानपि तद्भावं ज्ञात्वैकैकं रहो द्विजम् । सस्मितास्यः समाहूय प्राहोदारगिरा मुदा ।।२१।।**
**न वाच्यं क्वापि तेऽद्यैव गृहमेष्ये चरेत्यथ । तेऽपि सप्तैवमन्योन्यमशंसंतो ययुर्गृहान् ।।२२।।**

'भो निः+स्वः धनी इति द्वैतात् मां मा पाहि। भूतमात्रे समः असि। अत एहि।' इति प्रोक्त्वा ते पुरः पतितः।१९। तान् सर्वान् निवार्य, 'सर्व+गृहान् एष्यामि,' इति उदिते अपि ते भ्रान्तः ईश्वरं गुरुं ऊचुः, 'कैः विश्स्तव्यम्?' इति।२०। भगवान् अपि तत्+भावं ज्ञात्वा एके+एकं द्विजं रहः स+स्मित+आस्यः समाहूय उदारगिरा मुदा प्राह।२१। 'अद्य एव ते गृहे एष्ये। क्व अपि न वाच्यम्! चर।' इति। एवं ते सप्त अपि अन्यः अन्यं अशंसन्तः गृहान् ययौ।२२।

शेवटी सगळेच श्रीगुरूंना आपापल्या परीने गळ घालू लागले. 'भगवन्, अमुक गरीब, अमुक श्रीमंत असा भेद करू नका. आपण सर्व जीवांसाठी सम आहात. माझ्या घरी या.' असे म्हणून सगळ्यांनी श्रीगुरूंच्या समोर दंडवत घातले.१९. मग शेवटी त्या सर्वांना कसेबसे शांत करून श्रीगुरू म्हणाले, 'असे भांडू नका. मी सर्वांच्याच घरी येणार आहे!' श्रीगुरूंनी असे आश्वासन देऊनही, 'सर्वांनाच येतो म्हणता, मग कुणी विश्वास ठेवावा?' असे म्हणून त्यांनी साक्षात् परमेश्वरस्वरूप श्रीगुरूंवरच अविश्वास दाखविला.२०. आपल्या भक्तांची अंतरे जाणणाऱ्या भगवंताने हसऱ्या चेहऱ्याने, एकेका ब्राह्मणाला एकांतात बोलावून गंभीरपणे सांगितले,(२१) 'आजच मी तुझ्या घरी येणार आहे. कुणालाही सांगू नकोस! गुपचुप घरी जा.' अशा रीतीने ते सातही भक्त एकमेकांशी न बोलता मुकाट्याने आपापल्या घरी निघून गेले.२२.

**तत्रत्यैः क्व भवान् याति नो हित्वेत्युदितेऽत्र तु । तिष्ठामीति प्रभुः प्रोक्त्वाष्टौ ग्रामानेकदाभ्यगात् ।।२३।।**
**स्थलेषूवास पञ्चाहमष्टस्वपि जगन्मयः । लौकिकैकस्वरूपेण ततोऽस्थात् सङ्गमे प्रभुः ।।२४।।**
**स्वाद्वन्नशाटीकन्त्राण-पादुकार्पणसेवनैः । सन्तोषितः स भगवान् भक्तैराप मुहुर्मठम् ।।२५।।**
**पुनः सर्वेऽपि ते प्राप्ताः कार्तिक्यां तु परस्परम् । ऊचुर्मे धाम्नि पञ्चाहं दीपाल्यां संस्थितो गुरुः ।।२६।।**
**तत्रत्या अपि तं प्राहुः पञ्चाहं क्वापि नो गतः । अत्रैव प्रभुरस्माभिर् दीपावल्युत्सवं व्यधात् ।।२७।।**

तत्रत्यैः, 'भवान् नः हित्वा क्व याति?' इति उदिते, '(अहं) तु अत्र तिष्ठामि' इति प्रभुः प्रोक्त्वा, अष्टौ ग्रामान् एकदा अभ्यगात्।२३। जगत्+मयः अष्टेसु अपि स्थलेषु पञ्च+अहं उवास। ततः लौकिक+एक+स्वरूपेण प्रभुः सङ्गमे अस्थात्।२४। स्वादु+अन्न+शाटी+कं+त्राण+पादुका+अर्पण+सेवनैः भक्तैः सन्तोषितः भगवान् मुहुः मठं आप।२५। पुनः ते सर्वे अपि कार्तिक्यां प्राप्ताः परस्परं ऊचुः, 'गुरुः दीपाल्यां पञ्च+अहं मे धाम्नि संस्थितः।'२६। तत्रत्या अपि तं प्राहुः, 'प्रभुः पञ्च+अहं क्व अपि नो गतः। अत्र एव अस्माभिः दीपावलि उत्सवं व्यधात्।'२७।

हा सर्व प्रकार पाहून गाणगापुरच्या भक्तांनी विचारले, 'देवा, आपण दिवाळीत आम्हाला सोडून कुठे जाता?' त्यांना श्रीगुरू म्हणाले, 'मी तर इथेच थांबणार आहे!' असे त्यांचे समाधान करून सद्गुरुनाथ एकाच वेळी आठ गावांना गेले.२३. विश्वात्मक श्रीगुरू आठ गावांत नुसतचे गेले नाहीत तर त्या सर्वच गावी पाच दिवसपर्यंत राहिले. शिवाय एका (मुख्य) लौकिक स्वरूपाने संगमावरही राहिले.२४. गावोगावच्या भक्तांनी त्यांना गोडधोड जेवणाने, छाटी, शिरस्त्राण, पादुका इत्यादि अर्पण करून आणि त्यांची भक्तिभावाने सेवा करून त्यांना प्रसन्न केले. श्रीगुरूही आपल्या त्या सर्व प्रेमळ भक्तांचे समाधान करून मठात परतले.२५. पुनः ते सगळे कार्तिकी पौर्णिमेला श्रीगुरूंच्या दर्शनाला आले असता एकमेकांना सांगू लागले, 'गुरुमहाराज दिवाळीचे पाचही दिवस आमच्याकडेच होते!'२६. त्यांचा परस्परांतला वाद ऐकून गाणगापूरचे लोक त्यांना म्हणाले, 'महाराज कुठेही गेले नाहीत. दिवाळी इथेच आमच्याबरोबरच साजरी केली!' २७.

**मृषा मृषेति चान्योन्यं तदा प्रलपतो विभुः । तान्प्राह तूष्णीं स्थेयं भोः सर्वत्राहं गतः खलु ।।२८।।**
**तदा ते चकिताः सर्वे तुष्टुवुर्नतकन्धराः । भगवंस्ते परं पारं महिम्नोऽजानतां हि नः ।।२९।।**
**कथं लौकिकवाचस्त्वं स्तोत्रपात्रो भविष्यसि । श्रुतवाचामपि ब्रह्मन् न गुहाशयसंस्थित ।।३०।।**

तदा 'मृषा, मृषा' इति च अन्यःअन्यं प्रलपतः तान् प्रभुः प्राह, 'भोः तूष्णीं स्थेयम्। अहं सर्वत्र गतः खलु!'२८। तदा ते सर्वे चकिताः नत+कंधराः तुष्टुवुः। 'भगवन् ते महिम्नः परं पारं नः अजानतां हि।'२९। 'लौकिक+वाचः त्वं कथं स्तोत्रपात्रः भविष्यसि? (हे) गुहाशय+संस्थित ब्रह्मन्, श्रुत+वाचां अपि (स्तोत्रपात्रः) न।'३०।

तेव्हा, एकमेकांना 'खोटे, खोटे' असा प्रलाप करणाऱ्या त्या भक्तांना श्रीगुरूंनी शांत व्हायला सांगितले आणि म्हणाले, 'मी खरोखर सर्वांच्याच घरी होतो!'२८. तेव्हा आश्चर्यचकित होऊन सर्वांनी माना तुकवून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'भगवंता, तुझ्या महिमेचा परपार आम्हाला कळणे शक्य नाही.'२९. आमच्या ह्या लौकिक वाचेने तर आम्ही स्तुती करू शकतच नाही, पण हे गहन अंतरात राहणाऱ्या कूटस्थ ब्रह्मा, वेदांच्या वाचेलाही ते शक्य नाही. ब्रह्माला तैत्तिरीय उपनिषदांत (२:१:१) खोल अंतरात निहित असे म्हटले आहे (*निहितो गुहायाम्*). गुहाशय म्हणजे बुद्धी. तिच्या ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या त्रिपुटीतून होणाऱ्या व्यवहारातच भ्रांतिद्वारा भोग व विवेकाने मोक्ष निगूढ आहेत. आत्मस्वरूपही (ब्रह्म) त्या बुद्धीच्या माध्यमांतूनच उपलब्ध होते. म्हणून **गुहाशयांत संस्थित** असे विशेषण इथे योजले आहे. कठोपनिषदातही (१:३:१२) 'हा आत्मा सर्व जीवमात्रांत गूढरूपाने वास करतो; पण तो केवळ सूक्ष्म दृष्टीच्या ऋषींनाच त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीने दिसतो' असे म्हटले आहे. केनोपनिषदातही 'जे वाचेने व्यक्त होत नाही, ज्याने वाचा अभिव्यक्त होते' असे ब्रह्माचे वर्णन केले आहे. त्यानेही वाणीने त्याचे स्तोत्र करता येत नाही याचीच पुष्टी होते.३०.

**विश्वव्यापक तेऽनन्त दिव्यं जन्म क्रियाप्यज । नान्यार्थं नोऽमृतत्वार्थमवतारप्रयोजनम् ।।३१।।**
**श्रूयते दृश्यतेऽदो यत् त्वन्मायेयं दुरत्यया । मा वृणोत्विविति भो श्रीमन् देहि नो दक्षिणां वराम् ।।३२।।**
**इत्युक्त्वा प्रणतिं चक्रुस्तान्सन्तोष्य जगत्प्रभुः । सर्वान्प्रस्थापयामास स्वं स्वं धामापि ते ययुः ।।३३।।**
**एवं स भगवान्नूनं पूर्णः सच्चित्सुखात्मकः । भक्ताधीनतया चेष्टा दुर्विभाव्या व्यधादिह।।३४।।**

(हे) विश्व+व्यापक, (हे) अनन्त, (हे) अज, ते दिव्यं जन्म, क्रिया अपि न अन्य+अर्थम्। तव अवतार+प्रयोजनं नः अमृत+अर्थम्।३१। (हे) श्रीमन्, अदः यत् श्रूयते, दृश्यते इयं दुः+अत्यया त्वत्+माया नः न आवृणोतु इति वरां दक्षिणां देहि।३२। इति उक्त्वा प्रणतिं चक्रुः। जगत्+प्रभुः तान् सर्वान् संतोष्य प्रस्थापयामास। ते अपि स्वं स्वं धामं ययुः।३३। एवं सः पूर्णः सत्+चित्+सुख+आत्मकः भगवान् नूनं इह भक्त+अधीन+तया दुः+विभाव्या चेष्टा व्यधात्।३४।

'विश्वाला व्यापून राहिलेल्या, अनंत, निर्विकार सद्गुरो, तुझे अवतार आणि तुझ्या लीला अलौकिक आहेत. तुझ्या अवताराचे प्रयोजनहि अन्य कांहीही नसून आम्हा भक्तांचा मोक्ष हेच आहे.३१. श्रीमंता, हे जे कांही दिसणारे, ऐकले जाणारे इंद्रियगोचर जगत् आहे ती सर्व तुझी दुरत्यय माया आहे. तिच्या आवरणापासून आम्हांला मुक्त ठेव.' या प्रार्थनेत हे अभिप्रेत आहे की जीव हा परमात्म्याचाच अंश असल्याने त्याला वास्तव असा बंध नाही. मायेच्या आवरणाचा आभासिक बंधच आहे. 'ह्या जगाचा न निरोध आहे न उत्पत्ती आहे; इथे ना कुणी ना बद्ध आहे ना साधक; न कुणी मुमुक्षू आहे न कुणी मुक्त. अशी ही परमार्थता आहे,' या विद्यारण्यस्वामींच्या पंचदशीतील (*न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुर्न वा मुक्त इत्येषा परमार्थता।।* ६:२३५।।) वचनाचा हाच अभिप्राय आहे. म्हणून 'मायेच्या आवरणापासून आम्हाला मुक्त ठेव,' हीच श्रेष्ठ दक्षिणा त्या ब्राह्मणांनी मागितली आहे. दक्षिणा हा ब्राह्मणांचा अधिकारच आहे.३२. अशी प्रार्थना करून त्यांनी प्रभूंना प्रणिपात केले. जगन्नाथ सद्गुरूंनी त्या सर्वांचे समाधान करून त्यांना निरोप दिला. मग ते सर्व आपापल्या घरी गेले.३३. तो सच्चिदानंदस्वरूप भगवंत भक्तांना वश होऊन अशा मानवी बुद्धीला अगम्य अशा लीला करीत गाणगापुरांत राहिला होता.३४.

**जात्याचारवयोरूप-विद्यार्थगुणपौरुषम् । नापेक्षते हि भगवान् श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।३५।।**
**शृणु चित्रं प्रवक्ष्यामि कश्चिच्छूद्रो गुरुप्रियः । दास्येनैवैहिकान् भोगान् भुक्त्वान्ते मुक्तिभागभूत् ।।३६।।**
**कृषीवलः स तु सदा स्वकर्मासक्त एव तम् । स्वक्षेत्रादामठं यांतं ननाम प्रत्यहं गुरुम् ।।३७।।**
**तद्गमागमसौख्यार्थं प्रत्यहं सङ्गमायनम् । अपास्य कण्टकाश्मादीन् सुगमं विशदं व्यधात् ।।३८।।**

भगवान् जाति+आचार+वयः+रूप+विद्या+अर्थ+गुण+पौरुषं न हि अपेक्षते। प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।३५। 'चित्रं प्रवक्ष्यामि। शृणु। कश्चित् गुरु+प्रियः शूद्रः दास्येन एव ऐहिकान् भोगान् भुक्त्वा अन्ते मुक्ति+भाक् अभूत्।३६। सः कृषीवलः सदा स्व+कर्म+असक्तः एव। स्व+क्षेत्रात् आमठं यान्तं तं गुरुं प्रति+अहं ननाम।३७। प्रति+अहं तत्+गम+आगम+सौख्य+अर्थं सङ्गम+अयनं कण्टक+अश्मादीन् अपास्य सुगमं विशदं व्यधात्।३८।

त्या परमात्म्याला भक्ताकडून ब्राह्मणादि जाती; श्रौत वा स्मार्त आचार; बाल, युवा, वृद्ध आदि वय; सुंदर रूप; भौतिक वा आध्यात्मिक विद्या; संपदा; शांती, दया, क्षमा आदि गुण; प्राण, इंद्रिये वा शरीर यांचे बल या कशाचीही अपेक्षा नव्हती. त्यांना अपेक्षा होती तर ती केवळ दृढ श्रद्धा आणि गाढ भक्ती यांची! इथे श्रीगुरूंना **प्रभू** हे विशेषण लावण्यामागचा हेतू श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत सांगितला आहे. भक्तांचे ईप्सित पुरविताना त्यांच्या प्रभुत्वामुळे त्यांना कोणीही अडवू शकत नाही. इथे त्यांनी ऋग्वेदाचा संदर्भ दिला आहे (८:८१:३).३५.

'असाच एक चमत्कार घडलेला तुला सांगतो, ऐक. श्रीगुरूंचा आवडता एक शूद्र भक्त होता.३६. तो शेतकरी आपले शेतीचे काम अनासक्त वृत्तीने करायचा. रोज मठाकडून येणाऱ्या श्रीगुरूंना तो साष्टांग नमस्कार घालायचा.३७. श्रीगुरूंना चालताना टोचू वा लागू नयेत म्हणून तो संगमाच्या वाटेवरील काटे, खडे इत्यादि बाजूला सारून तो रस्ता मऊ आणि रुंद करायचा.'३८.

**नत्वा पूर्ववदायान्तं मुदा तद्गतमानसः । कृषिं चकार तं दासं पृच्छति स्मैकदा गुरुः ।।३९।।**
**सदा मेऽग्रे कुतः शूद्र पतस्येतेन किं वद । साध्यं किं तेऽस्ति मनसि तदद्योद्घाटयाखिलम् ।।४०।।**

**।। शूद्र उवाच ।।**

**भजामि सुखकामस्त्वां क्षेत्रं ते कृपयाखिलम् । मनोज्ञं भाति तत्प्रेक्ष नोपेक्ष्यः पादजोऽप्यहम्।।४१।।**
**तदा सस्मितमीशोऽपि सर्वं क्षेत्रं विलोक्य तत् । आप्रादुर्भूतसस्यं तं प्राह द्राक् छिन्ध्यदोऽखिलम् ।।४२।।**

आयान्तं मुदा तत्+गत+मानसः पूर्ववत् नत्वा कृषिं चकार। तं दासं एकदा गुरुः एकदा पृच्छति स्म।३९। '(हे) शूद्र, सदा मे अग्रे कुतः पतसि? एतेन ते किं साध्यम्? ते मनसि किं अस्ति? तत् अखिलं अद्य उद्घाटय।'४०। शूद्र उवाच। त्वां सुख+कामः भजामि। ते कृपया अखिलं क्षेत्रं मनोज्ञं भाति। तत् प्रेक्ष। पादजः अपि अहं न उपेक्ष्यः।४१। तदा ईशः अपि सस्मितं तत् सर्वं आ+प्रादुर्भूत+सस्यं क्षेत्रं विलोक्य तं प्राह, 'अदः अखिलं द्राक् छिन्धि।'४२।

परत संगमाकडून श्रीगुरू आले की पहिल्यासारखाच दंडवत घालायचा आणि आपल्या शेतीच्या कामाला लागायचा. त्या दासाला एकदा श्रीगुरूंनी विचारले,(३९) 'काय रे शूद्रा! रोज का माझ्यासमोर आडवा पडतोस? तुला यातून काय साधायचे आहे? तुझ्या मनात तरी काय आहे? आज सगळे कांही मला सांग पाहू.'४०.

तो शेतकरी म्हणाला, 'सुखाच्या इच्छेने मी आपली भक्ती करतो. आपल्या कृपेने ही माझी शेती चांगली दिसतेय, तिच्यावर आपली कृपादृष्टी एकवार पडू द्या! शूद्र म्हणून माझी उपेक्षा करू नका.'४१. त्याच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरू परमेश्वरांनी ते नुकत्याच अंकुरलेल्या पिकाने हिरवे दिसणारे सर्व रान पाहिले; आणि त्याला म्हणाले, 'हे सर्व लगेच कापून टाक!४२.

**विश्वासो मेऽस्ति वाक्ये चेच्छिन्धि मे यावदागमः । इत्युक्त्वा संगमं गत्वा प्रभुः कर्माह्निकं व्यधात् ।।४३।।**
**गत्वा शूद्रोऽपि पत्ये तु प्राह निश्चित्य ते करम् । क्षेत्रं देहीति स प्राह नेदं साध्वद्य कर्षक ।।४४।।**
**शश्वत्प्रार्थ्य परुद्दत्त-द्विगुणं भागमङ्घ्रिजः । दातुं निश्चित्य जग्राह प्रमापत्रमतोऽपि सः ।।४५।।**
**आहूयाथार्थलुब्धान्स लोकान्यावच्छिनत्ति तत् । सापत्या क्षेत्रमेत्य द्राग् वारयामास तं वधूः ।।४६।।**

मे वाक्ये विश्वासः अस्ति चेत् यावत् मे आगमः छिन्धि।' इति उक्त्वा प्रभुः सङ्गमं गत्वा आह्निकं कर्म व्यधात्।४३। शूद्रः अपि पत्ये गत्वा तु प्राह, 'ते करं निश्चित्य क्षेत्रं देहि' इति। स प्राह, '(हे) कर्षक, अद्य इदं न साधु।'४४। अङ्घ्रिजः शश्वत् प्रार्थ्य परुत्+दत्त+द्वि+गुणं दातुं निश्चित्य प्रमा+पत्रं जग्राह। अतः सः अपि (प्रमा+पत्रं जग्राह)।४५। अथ अर्थ+लुब्धान् आहूय लोकान् आहूय यावत् छिनत्ति तत् वधूः सापत्या द्राक् क्षेत्रं एत्य तं वारयामास।४६।

माझ्या वचनावर तुझा विश्वास असेल तर मी संगमावरून परत येईतोवर सगळे कापून टाक!' एवढे बोलून श्रीनरसिंह प्रभू संगमावर जाऊन आपल्या आह्निकात मग्न झाले.४३. इकडे तो शूद्र मालकाकडे गेला आणि म्हणाला, 'मालक, तुमचा कर पक्का करून मला शेत कापायला द्या.' मालकाने त्याला सांगितले की 'आज कांही ते शेत कापण्यायोग्य नाही.' त्यावर त्या शेतकऱ्याने वारंवार हात जोडून प्रार्थना केली आणि शेवटी गतवर्षीच्या दुप्पट कर देण्याचे मान्य करून त्याच्याकडून करारपत्र घेतले. त्या मालकानेही तसेच पत्र शेतकऱ्याकडून घेतले.४५.

मग त्या शूद्र भक्ताने द्रव्यलोभी कामकऱ्यांना बोलावून कापणीला सुरुवात केली. (कारण ही अकाळी कापणी करायला दुसरे कुणी आले नाहीत.) इतक्यात त्याच्या पत्नीला हे वृत्त समजून ती मुलाबाळांसह धावतपळत तिथे आली आणि त्याला अडवू लागली.४६.

**निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके । चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत् ।।४७।।**
**स नोन्मत्तस्तु भरत-प्रन्हादकबिभीषणैः । मातापित्रग्रजास्त्यक्ता गुर्वर्थे का कथान्यतः ।।४८।।**
**सा गत्वेशं रुदत्यूचे मुण्डिवाक्यानुवर्त्यहो । क्षेत्रं छिनत्ति तेऽपक्कं प्रमत्तस्तं निवारय ।।४९।।**
**निवारणाय सोऽप्येकं दूतं प्रेरयदेत्य सः । तस्मै गम्भीरया वाचा स्वामिवाक्यं शशंस ह ।।५०।।**

'निधाः तोत्राणि, मा छिन्धि.' इति वदन्त्याः सः कैशिके पत्+धूलिं चूर्ण+प्रतिनिधि+कृत्य पुनः आच्छिनत्।४७। सः न उन्मत्तः। भरत+प्रन्हादक+बिभीषणैः तु माता+पितृ+अग्रजाः त्यक्ताः। गुरु+अर्थे अन्यतः का कथा?४८। सा रुदति ईशं गत्वा ऊचे, 'अहो, मुण्डि+वाक्य+अनुवर्ती प्रमत्तः ते अपक्कं क्षेत्रं छिनत्ति। तं निवारय।'४९। सः अपि निवारणाय एकं दूतं प्रेरयत्। सः एत्य तस्मै गम्भीरया वाचा स्वामि+वाक्यं शशंस ह।५०।

'विळे-कोयते खाली ठेवा! कापू नका!' असा ओरडा करणाऱ्या बायकोच्या केशांत पायधुळीचेच जणू चूर्ण घालीत तिला त्याने पिटाळून लावले. पायधुळीचे चूर्ण केसांत घातले याचा अर्थ तिच्या अंगावर धावून गेल्यावर ती पळत सुटली आणि तिच्या पायांनी उडालेली धूळ तिच्या केसांत गेली असा दिसतो.४७. बायकोच्या अंगावर असे धाऊन जायला तो काय वेडा झाला होता का? असे वाटू नये यासाठी म्हटले आहे. तो वेडा नव्हता. भगवद्भक्तांची निष्ठा ही अशीच असते. भरताने माता, प्रह्लादाने पिता आणि बिभीषणाने ज्येष्ठ भ्राता यांचा गुरूंसाठी म्हणजेच ईश्वरासाठी - तोच सर्वांचा गुरू आहे - त्याग केला. पत्नी इत्यादि अन्य नात्यांची गोष्ट काय वेगळी आहे का?४८. ती शेतकऱ्याची पत्नी रडत रडत मालकाकडे गेली आणि म्हणाली, 'अहो आमच्या धन्याला वेड लागलंय! त्या संन्याशाच्या सांगण्यावरून तुमचे शेत पिकायच्या आधीच कापायला निघालेत. तुम्ही तरी त्यांना आवरा!'४९. त्या मालकानेही एक निरोप्या शेतावर पाठविला. त्याने येऊन शूद्राला मालकाचा निरोप गंभीर वाणीने सांगितला.५०.

**तं प्राह शूद्रोऽपि पत्ये शंसारब्धोद्यमस्य तु । पारं यास्ये नो बिभेमि तत्प्रमालिपिरस्त्यसौ ।।५१।।**
**दूतोऽप्यागत्य पत्ये तु तत्स्माचष्टेऽब्रवीत् स ताम् । शूद्र्यन्यथा कथं वाक्यं कार्यं सोऽप्यर्थधान्यवान् ।।५२।।**
**तच्छ्रुत्वा सा रुदत्याप क्षेत्रसीमां सुतान्विता । तच्छूद्रोऽप्यखिलं छित्वा गुर्वागममचिन्तयत् ।।५३।।**
**कृत्वाप्याह्निकमागच्छन्छान्तं सर्वमवेक्ष्य तम् । प्रणतं प्राह किमिदं कृतं साहजिकोक्तितः ।।५४।।**
**यदन्येन हृदापीदृक् कर्तुं शक्यं न भुव्यदः । कर्माद्य दुष्करं निन्द्यं त्वया कृतमतःपरम् ।।५५।।**

शूद्रः अपि तं प्राह। पत्ये शंस, 'आरब्ध+उद्यमस्य तु पारं यास्ये! (अहं) न बिभेमि। असौ तत्+प्रमा+लिपि अस्ति।'५१। दूतः अपि आगत्य पत्ये तत् आचष्टे स्म। सः ताम् अब्रवीत्। '(हे) शूद्री, वाक्यं अन्यथा कथं कार्यम्? सः अपि अर्थ+धान्य+वान्।'५२। तत् श्रुत्वा रुदती सा सुत+अन्विता क्षेत्र+सीमां आप। तत् शूद्रः अपि अखिलं छित्वा गुरु+आगमं अचिन्तयत्।५३। आह्निकं कृत्वा आगच्छन् सर्वं शान्तं अवेक्ष्य प्रणतं तं प्राह, 'साहजिक+उक्तितः इदं किं कृतम्?'५४। 'भुवि यत् अन्येन हृदा अपि ईदृक् कर्तुं न शक्यं, अदः दुष्करं निन्द्यं कर्म अद्य त्वया कृतम्। अतः परं..'५५।

शूद्रानेही त्याला जवाब दिला. 'सांग मालकाला, आता हे सुरू केलेले काम मी तडीला नेणारच. मी कांही त्याला भीत नाही, हा पहा, त्याचा परवाना माझ्याकडे आहे.'५१. त्या निरोप्यानेही मालकाला जाऊन त्याचा जवाब सांगितला. तो त्या शेतकरणीला म्हणाला, 'बाई काय करणार? एकदा लिहून दिलेले पत्र परत कसे घेणार? आणि मला ठाऊक आहे मला कर देण्यासाठी त्याच्याकडे धान्यही आहे आणि पैसाही आहे.'५२. मग ती शूद्रस्त्री रडत रडतच मुलांसह शेताच्या बंधाऱ्याला आली. तोपर्यंत त्या शेतकऱ्याने सगळे शेत कापून टाकले होते आणि तो श्रीगुरू संगमावरून येण्याची वाट पहात होता.५३. श्रीगुरू आपले आह्निक करून संगमावरून आले आणि त्यांनी सगळ्या शेताची कापणी झालेली आणि सर्व सामसूम पाहिली आणि दंडवत घालीत असलेल्या शेतकऱ्याला म्हणाले, 'अरे, मी सहज बोलून गेलो; तर हे तू काय केलेस?'५५.

**कुतस्ते भविता वृत्तिर्दास्यसीशाय किं वद । अपक्कं हरितं सर्वं सस्यमेतद्वृथा गतम् ।।५६।।**
**स प्राहोक्तं कथमपि श्रुतवत्सद्गुरोर्वचः । तन्मेऽपि फलदं जन्म दत्तं येन स वृत्तिदः ।।५७।।**
**भक्तिश्चेदुक्तवद्भूयात्त इत्युक्त्वा ययौ गुरुः । सोऽप्याप स्वगृहं धीरो ध्यायन्हरिपदाम्बुजम् ।।५८।।**
**कालेनाल्पीयसा सूर्य इते मूलर्क्षमम्बुदः । ववर्ष च्छिन्नमपि तद्यावनालाद्यवर्धत ।।५९।।**
**प्रादुर्भूतानसंभाव्यानङ्कुरानभितोऽमितान् । दृष्ट्वा जल्हादिरे सर्वे शूद्र्यप्यत्यन्तहर्षिता ।।६०।।**

'(अतः परं) ते वृत्तिः कुतः भवति? ईशाय किं दास्यसि? वद। एतत् हरितं अपक्कं सस्यं सर्वं वृथा गतम्!'५६। सः प्राह, 'कथं अपि उक्तं सद्गुरोः वचं श्रुतवत्। तत् मे अपि फलदम्। येन जन्म दत्तं स वृत्तिदः!'५७। 'ते भक्तिः चेत् उक्त+वत् भूयात्।' इति उक्त्वा गुरुः ययौ। सः अपि धीरः हरि+पद+अम्बुजं ध्यायन् स्वगृहं आप।५८। अल्पेन कालेन सूर्यः मूल+ऋक्षं इते अम्बुदः ववर्ष। तत् छिन्नं अपि यावनालादि अवर्धत।५९। अभितः अमितान् असंभाव्यान् अङ्कुरान् प्रादुर्भूतान् दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे। शूद्री अपि अत्यन्त हर्षिता।६०।

'आतां तुझा निर्वाह कसा होईल? आणि मालकाला काय देणार? सांग बरे! छान उगवलेले हे हिरवे गार शेत सगळे नापीक वाया गेले!'५६. तो उत्तरला, 'सहज वा थट्टेने कसेही सद्गुरूंचे वचन हे वेदवाक्यासारखे आहे. मला तेसुद्धा उत्तम फलदायक ठरेल! निर्वाहाचे म्हणाल तर जो जन्म देतो तोच अन्नही देतो.' इथे श्रीस्वामिमहाराजांनी एक सुभाषित उद्धृत केले आहे. *यो मे गर्भगतस्यापि वृत्तीं कल्पितवान् विभुः। शेषवृत्तिविधानाय स वै सुप्तोऽथवा मृतः।।* ज्या भगवंताने गर्भात असतानाही माझ्या जीविकेची योजना केली तो उरलेल्या आयुष्याची सोय न करायला काय झोपलाय की मेलाय?५७. 'तुझी जर अशी भक्ती असेल तर तू म्हणशील तसेच होईल!' असे म्हणून श्रीगुरू मठाला गेले. तो धैर्यधर शूद्रही श्रीगुरूंच्या पदकमलांचे चिंतन करीत आपल्या घरी परतला.५८. कांही थोड्या काळाने सूर्य मूळ नक्षत्राला गेला असताना मेघ वर्षला. त्यायोगे छाटून टाकलेल्या त्या ज्वारी इत्यादि पीकांच्या धाटांना पुनः चारी बाजूनी अगणित असंभाव्य अंकुर फुटले. ते पाहून सर्वांना आनंद झाला. शूद्री तर हरखून गेली.६०.

**पत्युः पादौ सकारुण्यं गृहीत्वा गद्गदाक्षरा । बभाषे गुरुभक्तोऽसि मम मन्तून्क्षमस्व भोः ।।६१।।**
**तथेत्युक्त्वा तया शूद्रः प्रपूज्य क्षेत्रपं गुरुम् । यान्तं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतो वाक्यमब्रवीत् ।।६२।।**
**अङ्घ्री चिन्तामणिर्वाक्यं सुधास्पर्धि दयानिधे । ज्योतिर्मयो न वेत्त्यन्धो घूकोऽर्कमिव धाम ते ।।६३।।**
**दृष्टं समूढपुण्येन धाम ते दिव्यमद्भुतम् । कृतकृत्योऽस्म्यतो देव मां माधोक्षज विस्मर।।६४।।**

पत्युः पादौ स+कारुण्यं गृहीत्वा गद्गद+अक्षरा बभाषे, 'भोः गुरु+भक्तः असि। मम मन्तून् क्षमस्व।'६१। तथा इति उक्त्वा शूद्रः तया क्षेत्र+पं प्रपूज्य, यान्तं गुरुं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतः वाक्यं अब्रवीत्।६२। '(हे) दया+निधे, (ते) अङ्घ्री चिन्तामणिः, वाक्यं सुधा+स्पर्धि, धाम ज्योतिः+मयः घूकः अर्क इव अन्धः न वेत्ति।६३। (हे) देव, (मया अपि) समूढ+पुण्येन ते दिव्यं अद्भुतं धाम दृष्टम्। अतः कृतकृत्यः अस्मि। (हे) अधोक्षज, मां मा विस्मर।६४।

तिच्या डोळ्यांतून पाणी वाहू लागले. पतीचे पाय धरून भरलेल्या कंठाने ती म्हणाली, 'अहो, तुम्ही खरेच गुरुभक्त आहात. माझ्या अपराधांची क्षमा करा.'६१. 'बरं, बरं' असे तिला म्हणून तिच्याबरोबर शेताला जाऊन त्याने क्षेत्राचे रक्षण करणाऱ्या देवाची पूजा केली. इथे **क्षेत्रप** या शब्दावर श्लेष करून श्रीस्वामिमहाराजांनी क्षेत्रप म्हणजे *क्षेत्रज्ञ* अर्थात् आत्मा असा अर्थ करून त्याच्या अज्ञानाने अश्रद्धा, त्यामुळे पतिनिंदा, श्रीगुरूंचा धिक्कार अशी दुष्कर्मे तिच्याकडून झाली. पण आता त्या आत्म्याच्याच प्रसादाने लौकिक लाभ दिसल्याने त्या तमोगुणाविष्ट शूद्रस्त्रीला दुर्लभ शांती प्राप्त झाली ही त्या क्षेत्रज्ञाचीच कृपा नाही का? अशा त्या अंतःस्थ आत्मरूपाचा सत्कार केला. त्याच वेळी श्रीगुरु तिकडून जात होते. त्यांना ती पिकलेली शेती दाखवून त्या शेतकऱ्याने साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला,(६२) 'दयासागरा, तुझे पाय चिंतामणी आहेत, तुझे वचन अमृताहून गोड आहे आणि तुझे स्वरूप ज्योतिर्मय आहे; परंतु दिवाभीताला सूर्य दिसत नाही तसे तुझे स्वरूप अज्ञानी जीवांना दिसत नाही. ते आज मी पाहिले. मी कृतकृत्य झालो! अधोक्षजा तुला माझा विसर पडू देऊ नको.'६४.

**तमाह श्रीगुरुः शूद्र धन्योऽस्यवरवर्ण ते । परितुष्टोऽस्मि दास्येन नूनं सद्गतिभाग्भव ।।६५।।**
**दुराचारोऽपि यदि चेत् सेवते मामनन्यधीः । स तु साधुर्हि तस्मात्त्वं स्वाचारो भक्तिमान् मयि ।।६६।।**
**अतस्ते दत्तमेतत्तु निवसेत् त्वत्कुलेऽमले । अचला कमला दास्यं मदीयं चाप्यसंशयम् ।।६७।।**
**इत्युक्त्वागाद्गुरुः सोऽपि गत्वेशं प्राह निश्चितात् । अधिभागं प्रदास्ये ते यतो धान्यर्धिरद्भुता ।।६८।।**

श्रीगुरुः तं आह, '(हे) शूद्र, अवर+वर्ण धन्यः असि। ते दास्येन नूनं परितुष्टः अस्मि। सत्+गति+भाक् भव।'६५। 'दुः+आचारः अपि यदि मां अनन्य+धीः सेवते चेत् स तु साधुः। हि तस्मात् स्व+आचारः (सु+आचारः) मयि भक्ति+मान्।६६। अतः ते एतत् तु ते असंशयं दत्तं, अचला कमला, मदीयं दास्यं अपि।'६७। इति उक्त्वा गुरुः अगात्। सः ईशं गत्वा प्राह, 'यतः अदभुता धान्य+ऋद्धिः ते निश्चितात् अधि+भागं प्रदास्ये'।६८।

त्याला श्रीगुरू म्हणाले, 'शूद्रा, तूं वर्णाने जरी कनिष्ठ असलास तरी धन्य आहेस! तुझ्या दास्यभक्तीने मी खरोखर पूर्ण प्रसन्न झालो आहे! तुला सद्गती लाभेल.'६५. श्रीगुरूंच्या बोलण्यात गीतेच्या (९:३०) श्लोकाचाच अनुवाद दिसतो. 'अगदी दुराचरणी जर अनन्यभावाने मला भजत असेल तर साधूच मानावा! तू तर आपल्या स्वतः चा (जातीचा) आचार पाळणारा आहेस. (उत्तम आचार करणारा आहेस असाही अर्थ करता येतो.) शिवाय माझी भक्ती करणारा आहेस.६६. म्हणून तुला माझे हे निःसंशय देणे आहे, स्थिर लक्ष्मी (संपत्ती) आणि माझे दास्य!' स्थिर संपत्ती दिल्यावर कदाचित् त्याच्याकडून प्रमाद घडू शकतो. म्हणून त्याला सन्मार्गावर स्थिरावणारे आपले दास्यही त्याला दिले आहे. इथे त्याला आत्मज्ञानाचा उपदेश का केला नाही अशी शंका घेण्याचे कारण नाही. शूद्राला उपनयनाभावी वेदांचा अभ्यास करता येत नाही. कुणी म्हणेल की ब्रह्मसूत्रानुसार (*तदुपर्यपि बादरायणः संभवात्।* १:३:२६) उपनयन न करताही देवांना वैदिक ज्ञान होऊ शकते तर शूद्रांना का नाही? देवांच्या बाबतीत त्यांना पूर्वजन्मार्जित पुण्याईने स्वयंप्रतिभेनेच वेदांचे ज्ञान असते. वेदांचे अध्ययन करावेच लागत नाही.

**स प्राह नान्यथोक्तिर्मे प्रसादात्सद्गुरोस्त्वियम् । लब्धा धान्यर्धिरनयं न स्पृशाम्यर्पयोक्तवत् ।।६९।।**
**परिपक्वं तदा दृष्ट्वा सस्यं छित्वानयद् गृहम् । कामं शेषं जनेभ्योऽदादमितं धान्यमुत्तमम् ।।७०।।**

सः प्राह, 'मे उक्तिःअन्यथा न। इयं धान्य+ऋद्धिः तु सद्गुरोः प्रसादात् लब्धा। अनयं न स्पृशामि। उक्तवत् अर्पय।'६९। तदा सस्यं परिपक्वं दृष्ट्वा छित्वा कामं गृहं आनयत्। शेषं अमितं उत्तमं धान्यं जनेभ्यः अदात्।७०।

त्यामुळे उपनयनसंस्काराची आवश्यकता नाही. शूद्राला वेदांच्या श्रवणाचा वा उच्चारणाचा अधिकार नसल्याने ते अध्यात्मविद्येचे अधिकारी कसे होतील? छांदोग्य उपनिषदात (४:२:५) रैक्वाने जानश्रुतीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करताना त्याला 'शूद्र' म्हटले आहे ते रूढ अर्थाने नाही. आपल्या विद्याराहित्याने दुःखी होऊन (*शुचा*) गुरूकडे धावणारा (*दुद्राव*) तो शूद्र असा अर्थ आहे. जानश्रुति वस्तुतः क्षत्रियच होता. मग शूद्रांना मुक्ती कशी मिळेल? महाभारतात शांतिपर्वात (३२८:४९) सांगितल्याप्रमाणे त्यांना पुराणश्रवणाचा अधिकार आहे. त्या श्रवणादिकांपासून त्यांना ज्ञानाचा अधिकार प्राप्त होऊन जन्मांतरी मोक्षलाभ होईल. धर्मव्याध वगैरे हीनयातीतल्या ज्ञान्यांची उदाहरणे पुराणात आहेत. त्यांच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासामुळे त्या जातीतही ज्ञानोदय झाला आहे. म्हणून शेतकऱ्याला केलेले दास्यदान योग्यच आहे.६७. असे म्हणून श्रीगुरू पुढे गेले. तो शेतकरीही मालकाकडे जाऊन म्हणाला, 'शेतांत अद्भुतरीत्या अमाप धान्य पिकले आहे. मी तुम्हाला ठरल्याहून अधिक धान्य देतो.'६८. तो मालक म्हणाला, 'मी माझा शब्द फिरवणार नाही! ही धान्यसमृद्धी तुला गुरूंच्या प्रसादाने झाली आहे. अन्यायाच्या कमाईला मी शिवणार नाही. आपला जेवढा ठराव झाला होता, तेवढेच मला दे.'६९. मग ते पिकलेले धान्य त्याने यथेष्ट घरी आणूनही उरले. तेव्हा त्याने कितीतरी धान्य लोकांना वाटून टाकले.७०.

**बहवो लेभिरे धान्यं प्रकामं सोऽपि सद्गुरोः । कृपया परया भूत्वा श्रीमान्सेवेऽतिनीचवत् ।।७१।।**
**तत्रेदृश्यः प्रभोर्लीलाः कति वृत्तास्तु कृत्स्नशः । न ज्ञाताः कैरपि पुरं मन्ये धन्यतमं तु तत् ।।७२।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सत्तमाश्रितकाश्यादि-क्षेत्रेषु भुवि सत्स्वपि । प्रीत्योवास कुतस्तत्र भगवान् मे वदस्व तत् ।।७३।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**तत्र तीर्थान्यनेकानि देवा अप्यखिलाः खलु । जगन्निवास उद्वीक्ष्य तस्थौ ध्रुवमधोक्षजः ।।७४।।**

बहवः प्रकामं धान्यं लेभिरे। सः अपि सद्गुरोः परया कृपया श्रीमान् भूत्वा अति+नीच+वत् सेवे।७१। तत्र ईदृशाः प्रभोः लीलाः वृत्ताः। कृत्स्नशः कैः अपि न ज्ञाताः। तत् पुरं तु धन्यतमं मन्ये।७२। नामधारक उवाच। 'भुवि सत्+तम+आश्रित+काशी+आदि+क्षेत्रेषु भुवि सत्सु भगवान् कुतः तत्र प्रीत्या उवास? तत् मे वदस्व।'७३। सिद्ध उवाच। 'जगत्+निवास तत्र अनेकानि तीर्थानि, अखिलाः देवाः अपि उद्वीक्ष्य अधोक्षजः ध्रुवं तस्थौ।'७४।

'खूप लोक हवे तेवढे धान्य घेऊन गेले. तो शूद्रही सद्गुरूंच्या कृपेने धनवान झाला. तरीही त्याला आढ्यतेचा स्पर्शही झाला नाही. तो अत्यंत दीनपणे सद्गुरूंची सेवा करीत राहिला.७१. अशा ह्या प्रभूंच्या किती तरी लीला त्या गाणगापुरात झाल्या. त्या सगळ्याच कुणालाही ठाऊक नाही. खरोखर ते गाव धन्यतम आहे.' ७२. नामधारकाने प्रश्न केला. 'मोठमोठ्या संतांनी सेविलेली काशी आदि अनेक क्षेत्रे ह्या भूमीवर आहेत. मग भगवंतांनी अत्यंत प्रीतीपूर्वक गाणगापूरलाच का वास्तव्य केले? कृपया मला सांगा.'७३. सिद्ध उत्तरले, 'त्यांचा निवास सर्व जगांत असला तरी भगवान अधोक्षज तिथे अनेक तीर्थे आणि सर्व देवांचे वास्तव्य पाहूनच राहिले आहेत.'७४.

**मन्दधीभिस्तु तीर्थानि तिष्येऽज्ञातानि तान्यतः । गुरुः प्राहैकदा लोकं पावनानि प्रदर्शयन् ।।७५।।**
**काशीं जिगमिषो लोक सर्वतीर्थानि चात्र तु । दर्शयामीति तान्प्रोक्त्वा तीर्थान्याह स दर्शयन् ।।७६।।**
**संगमोऽयं प्रयागोऽष्टौ तीर्थान्यत्र तु षट्कुले । त्रिवेणीसङ्गमोऽयं तु पापघ्न्यमरजेष्टदा ।।७७।।**
**जीवनायेशदत्तेन्द्र-नीयमानसुधाघटात् । युद्धे जालन्धरहत-देवानाममृतं च्युतम् ।।७८।।**
**किञ्चिच्च्युतादपि महा-प्रवाहोऽत्रामरत्वदः । कालमृत्युभयाघघ्नी जातैषामरजा ततः ।।७९।।**
**मनोरथाख्यं तीर्थं तु कल्पद्रवश्वत्थसन्निधौ । सन्तोषतीर्थमग्रेऽत्र रुद्रो विश्वेश्वरः स्वयम् ।।८०।।**

तिष्ये मन्द+धीभिः तीर्थानि अज्ञातानि। तानि पावनानि प्रदर्शयन् गुरुः एकदा लोकं प्राह,।७५। '(हे) काशीं जिगमिषः लोकः, सर्व+तीर्थानि तु अत्र दर्शयामि' इति तान् प्रोक्त्वा तीर्थानि दर्शयन् सः आह।७६। अय सङ्गमः प्रयागः। अत्र तु षट्कूले अष्टौ तीर्थानि। अयं तु त्रिवेणी+सङ्गमः। अमरजा पाप+घ्नी, इष्ट+दा (च)।७७। युद्धे जालंधर+हत देवानां जीवनाय ईश+दत्त+इन्द्र+नीयमान+सुधा+घटात् अमृतं च्युतम्।७८। किञ्चित् च्युतात् अपि अत्र अमरत्व+दः महाप्रवाहः। ततः एषा काल+मृत्यु+भय+अघ+घ्नी अमरजा जाता।७९। कल्पद्रु+अश्वत्थ+सन्निधौ तु मनोरथ+आख्यं तीर्थम्। अग्रे सन्तोष+तीर्थं अत्र रुद्रः स्वयं विश्वेश्वरः।८०।

कलियुगातील मंदबुद्धीच्या जीवांना मात्र ही तीर्थे अज्ञात असल्याने ती पावन तीर्थे प्रकट करण्यासाठी श्रीगुरू एकदा लोकांना म्हणाले,(७५) 'काशीयात्रेला जाऊ इच्छिणाऱ्या लोक हो, सर्वच तीर्थे मी तुम्हाला इथेच, गाणगापुरातच दाखवतो,' असे म्हणून ते सांगू लागले.७६. हा भीमा आणि अमरजा यांचा संगमच प्रयाग आहे. इथे षट्कूलात आठ तीर्थे आहेत. हा त्रिवेणीसंगमच आहे. ही अमरजा वांछित देणारी आणि पाप नासणारी आहे.७७. देव आणि दैत्यांच्या युद्धांत जालंधर नांवाच्या दैत्याकडून देवांचा मोठा संहार होऊ लागला. त्यावेळी त्यांना जिवंत करण्यासाठी भगवान शिवांनी दिलेला अमृताचा घडा इंद्र घेऊन जात असाताना त्यातील किंचित्से अमृत भूमीवर पडले.७८. त्या अमृतापासून हा अमरत्व देणारा महाप्रवाह निघाला. त्यापासूनच ही कालमृत्यू, भय आणि पाप यांना वारणारी अमरजा उगम पावली.७९. पुढे कल्पवृक्षसमान ह्या अश्वत्थाजवळ मनोरथ तीर्थ आहे. इथला हा रुद्र साक्षात् विश्वेश्वरच जाणा.८०.

**वामहस्तेन नन्द्यण्डं धृत्वाङ्गुष्ठं च तर्जनीम् । संस्थाप्य शृङ्गयोर्मध्यात् कृतशैवीप्रदक्षिणः ।।८१।।**
**पश्येद्यदीशं मर्त्योऽपि देववच्छ्रीष्टयुग्भवेत् । साक्षात्काशीयमीशेन विहिता भक्ततुष्टये ।।८२।।**
**जीवन्मुक्तोऽत्र शैवः प्राग्लोके जड इतीरितः । येनाहिवज्जनो भोगा विषं स्त्रीः शववन्मताः ।।८३।।**

कृत+शैवी+प्रदक्षिणः वाम+हस्तेन नन्दी+अण्डं धृत्वा शृङ्गयोः मध्यात् अङ्गुष्ठं च तर्जनीं संस्थाप्य,।८१। मर्त्यः अपि यदि ईशं पश्येत् देववत् श्री+इष्ट+युक् भवेत्। ईशेन भक्त+तुष्टये विहिता इयं साक्षात् काशी।८२। प्राक् अत्र जीवन्+मुक्तः शैवः लोके जड इति ईरितः। येन जनः अहि+वत्, भोगाः विषं, स्त्रीः शव+वत् मताः।८३।

या शंकराला शैवा प्रदक्षिणा करून, डाव्या हाताने नंदीचे वृषण धरून व शिंगांवर अंगठा आणि तर्जनी ठेवून(८१) शंकराचे जो दर्शन घेईल तो मर्त्य मानवसुद्धा देवासारखा धन आणि स्त्री, अन्न, पान इत्यादि इष्ट भोगांनी युक्त होतो. ही भगवान शंकरांनी भक्ताच्या तोषासाठी स्थापन केलेली साक्षात् काशीच आहे.८२. पूर्वी इथे एक शंकराचा जीवन्मुक्त, सदैव निरतिशय आनंदांत निमग्न झालेला भक्त रहात होता. लोक त्याला वेडा म्हणत. त्याने लोक सापासारखे मानून त्यांचा संग टाकला होता. कारण लोकरूपी सापाच्या दंशाने दुर्वासनांचे विष मनात भिनून विषयबाधा होते आणि कामादिवेदनांनी कष्टत तो साधू, प्रमाद नावाच्या मृत्यूला बळी पडतो. भोगांना तो विषच मानी. भोग काय किंवा विष काय शरीरात भिनून मृत्यूला कारण होतात. विषयतादात्म्याने प्रमाद - स्वरूपाचे विस्मरण होणे हे मरणच आहे. स्त्री त्याला प्रेतासारखी वाटते. दिवसा गिधाडे जशी प्रेतावर उड्या टाकून त्याचे लचके तोडतात आणि लांडगे-कोल्हे एकांतात रमतात, तसेच ह्या स्त्रीरूप प्रेताशी विषयासक्त लोकांचे वर्तन असते. म्हणून स्त्री दृष्टीला पडली तरी स्नान करावे असे त्या शिवभक्ताचे मत होते.८३.

**कदाचित्स सदा युक्तः प्रमाथीन्द्रियसंयमी । बन्धूनाहात्र काशीयं त ऊचुर्दर्शयाद्य नः ।।८४।।**
**स दध्यावीशमीशोऽपि तदैत्याहेप्सितं वद । स प्राहाद्य त्वया सार्धं काशीं संस्थापय ध्रुवाम् ।।८५।।**
**तथेत्युक्त्वेश्वरोऽगात्तज् जलान्तः कुण्डमुत्तमम् । उद्भूतं तत्र विश्वेश-मूर्तिराविरभूत्क्षणात् ।।८६।।**
**काश्यां चिह्नानि यान्यत्र जातान्यालोक्य तानि सः । स्वजनान्दर्शयित्वोचे काशीयं क्वापि यात नो ।।८७।।**

सदा युक्तः प्रमाथी+इन्द्रिय+संयमी सः कदाचित् बन्धून् आह, 'अत्र इयं काशी।' ते ऊचुः, 'अद्य नः दर्शय!'८४। सः ईशं दध्यौ। ईशः तदा एत्य आह, 'ईप्सितं वद।' सः प्राह, 'अद्य त्वया सार्धं ध्रुवां काशीं संस्थापय।'८५। ईश्वरः 'तथा' उक्त्वा अगात्। तत् जल+अन्तः उत्तमं कुण्डं उद्भूतम्। तत्र क्षणात् विश्वेश+मूर्तिः आविरभूत्।८६। यानि काश्यां चिह्नानि तानि अत्र जातानि आलोक्य सः स्व+जनान् दर्शयित्वा ऊचे, 'इयं काशी। क्व अपि नो यात।'८७।

निरंतर आत्मस्वरूपाशी युक्त असलेला आणि बलिष्ठ इंद्रियांवरही ताबा असलेला तो पिसा एकदा आपल्या बांधवांना म्हणाला, 'इथे ही काशीच आहे!' ते म्हणाले, 'तर मग आज आम्हाला दाखव पाहू!'८४. शिवप्रभूंचे स्मरण केले. लगेच प्रकट होऊन ते म्हणाले, 'तुला काय हवे ते सांग.' तो म्हणाला, 'आज या ठिकाणी चिरंतन काशीची स्थापना करा.'८५.

शंकर परमात्मा 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. त्याच वेळी पाण्यातून एक उत्तम कुंड उद्भवले आणि तिथे क्षणांत विश्वेश्वराची मूर्ती प्रकट झाली.८६. काशीत जी जी चिह्ने आहेत ती सर्व इथे दिसू लागली. ती पाहून त्या शिवभक्ताने आपल्या बंधूंना दाखविली आणि म्हणाला, 'ही काशी! आता तुम्हाला कुठेही जायला नको.'८७.

**प्रत्यब्दं पूजयित्वा नो विठ्ठलं कुलदैवतम् । काशीयात्रात्र कर्तव्या सर्वाघघ्नीप्सितार्थदा ।।८८।।**
**तस्मात्काशीयमित्यस्मिन् गुरौ ब्रुवति तत्क्षणम् । पूर्वाश्रमस्वसा रत्ना-नाम्नी प्राप्य ननाम तम् ।।८९।।**
**तामाह श्रीगुरुः प्रोक्त-स्मृतिस्तेऽस्ति न वा वद । सापि स्मृत्वा तदा स्वाङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह ।।९०।।**
**तां खिन्नां प्रणतां प्राह प्रभुः पापं भवान्तरे । चेद्भोक्ष्यसेऽत्र कुष्ठं द्रागपैत्यंहः प्रयत्नतः ।।९१।।**
**सा प्राह मातृकुक्षौ मे यथेतो न भवेत्स्थितिः । तथैव भवता कार्यं नान्यज्जाने परात्पर ।।९२।।**

'प्रति अब्दं कुल+दैवतं विठ्ठलं पूजयित्वा अत्र सर्व+अघ+घ्नी इप्सित+अर्थ+दा काशी+यात्रा कर्तव्या।'८८। 'तस्मात् इयं काशी' इति अस्मिन् गुरौ ब्रुवति तत्+क्षणम् पूर्व+आश्रम+स्वसा रत्ना+नाम्नी प्राप्य तं ननाम।८९। श्रीगुरुः तां आह। 'ते प्रोक्त+स्मृतिः अस्ति वा न? वद।' सा अपि स्मृत्वा तदा स्व+अङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह।९०। तां खिन्नां प्रणतां प्रभुः प्राह, 'पापं भव+अन्तरे भोक्ष्यसे चेत् कुष्ठं द्राक् अपैति, अंहः प्रयत्नतः (अपैति)।'९१। सा प्राह, 'यथा इतः मे मातृ+कुक्षौ स्थितिः न भवेत् तथा एव भवता कार्यम्। (हे) परात्पर अन्यत् न जाने।'९२।

'दर वर्षी आपल्या कुलदैवताची - विठ्ठलाची पूजा करून पापहारी आणि ईप्सितदायी काशीयात्रा इथे विधिवत् करावी.'८८. 'तेव्हापासून ही काशी झाली,' असे श्रीगुरू बोलतात न बोलतात तोच त्याच क्षणी त्यांची पूर्वाश्रमातील भगिनी रत्नाबाई तिथे आली आणि तिने श्रीगुरूंना नमस्कार केला.८९. श्रीगुरूंनी तिला विचारले, 'मी काय सांगितले ते आठवते ना?' तिला श्रीगुरूंनी, 'तुझा पती संन्यास घेईल आणि शरीरावर कुष्ठ पसरेल' असे सांगितले ते आठवले आणि लगेच तिला आपल्या सर्वांगावर कोड फुटलेले दिसले.९०. तेव्हा रत्नाबाईंनी दुःखित होऊन त्यांना नमस्कार केला. श्रीगुरू तिला म्हणाले, 'हे पाप जर तू पुढच्या जन्मी भोगायला तयार असशील तर कुष्ठ लगेच दूर होऊ शकेल. पापाचा परिहार होण्यासाठी प्रयत्न करावा लागेल.'९१. ती म्हणाली, 'परात्पर सद्गुरो, यापुढे मला पुनः आईच्या गर्भात राहण्याची वेळ येऊ नये असेच आपण करा. मी याउपर कांही जाणत नाही!'९२.

**गुरुः प्राहाघहृत्तीर्थे त्र्यहं स्नानाच्छिवान्तिके । सप्तजन्मार्जितांहोऽपि नश्येत्कुष्ठस्य का कथा ।।९३।।**
**सापि तत्र त्र्यहस्नानाद् भूत्वा कुष्ठोनितामला । मठं निर्माय तत्रैव स्थिता मुक्ता बभूव ह ।।९४।।**
**गुरुस्त्वग्रेऽघहृज्जम्बु-द्वीपस्थाखिलतीर्थवत् । कोटितीर्थं दर्शयित्वा प्राहेदं सफलाघहृत् ।।९५।।**
**क्रान्तिपर्वग्रहेष्वत्र स्नानदानजपादयः । अक्षय्यानन्तफलदा अकुत्सितहृदां नृणाम् ।।९६।।**
**गयावद्रुद्रपादाख्यं तीर्थं त्वग्रे गयोक्तवत् । कृध्वं कर्मात्र कृष्णाग्रे चक्राख्यं द्वार्वतीसमम् ।।९७।।**

गुरुः प्राह, 'शिव+अन्तिके अघ+हृत् तीर्थे त्रि+अहं स्नानात् सप्त+जन्म+अर्जित+अंहः अपि नश्येत्। कुष्ठस्य का कथा?'९३। सा अपि तत्र त्रि+अह+स्नानात् अमला कुष्ठ+ऊनिता भूत्वा मठं निर्माय तत्र एव स्थिता मुक्ता बभूव ह।९४। गुरुः तु अग्रे जम्बु+द्वीप+स्थ+अखिल+तीर्थ+वत् अघ+हृत् कोटि+तीर्थं दर्शयित्वा प्राह, 'इदं सकल+अघ+हृत्।'९५। अत्र क्रान्ति+पर्व+ग्रहेषु स्नान+दान+जप+आदयः अकुत्सित+हृदा नृणां अक्षय्य+अनन्त+फलदाः।९६। अग्रे तु गयावत रुद्र+पाद+आख्यं तीर्थम्। अत्र कर्म कृध्वम्। (तथा) अत्र कृष्ण+अग्रे चक्र+आख्यं द्वार्वतीसमं (तीर्थम्)।९७।

गुरू त्यावर म्हणाले, 'इथे शिवमंदिराजवळ पापनाशी तीर्थ आहे. त्यात तीन दिवस स्नान केल्यावर सात जन्मांचेही पाप नष्ट होते. मग कुष्ठाची काय कथा?'९३. रत्नाबाईने त्याप्रमाणे पापनाशन तीर्थात तीन दिवस स्नान केले. श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे तिचे कुष्ठ पूर्ण मावळले आणि ती शुद्ध झाली. पुढे तिने तिथेच एक मठी बांधली आणि तिथेच राहून अंती मुक्त झाली.९४. श्रीगुरू तिथून पुढे निघाले आणि सर्व लोकांना जम्बुद्वीपातील (भूलोकातील सात द्वीपांतील प्रमुख जम्बुद्वीप आहे. त्यातील मध्यवर्ती भारतवर्ष आणि त्याच्या मधोमध गाणगापूर आहे.) सर्व तीर्थांसमान पापहारी असे कोटितीर्थ दाखविले आणि म्हणाले, 'हे सर्व पापांचा नाश करणारे तीर्थ आहे.'९५. इथे मेषादि संक्रांतीला, पौर्णिमा-अमावस्या-व्यतिपातादि पर्वणींना आणि सूर्य-चंद्रग्रहणात स्नान, दान, जप इत्यादि केल्यास निष्कपट आणि श्रद्धावान भक्तांना अक्षय आणि अनंत फळ मिळते.९६. याच्या पुढे रुद्रपाद नावाचे गयेसारखेच तीर्थ आहे. इथे गयेला जसे सांगितले आहे तसे कर्म करावे. पुढे श्रीकृष्णासमोर चक्र नावाचे तीर्थ आहे. ते द्वारकेसारखे आहे.९७.

**द्वारकोक्तवदाचीर्णात् फलं तस्याश्चतुर्गुणम् । स्नानाज्ज्ञानी भवत्यत्र पतितोऽप्यस्थिचक्रवत् ।।९८।।**
**गोकर्णवद्ग्रामपूर्व-भागः कल्लेश्वरोऽत्र तु । महाबलेशवत्तीर्थं मन्मथाख्यं सुसिद्धिदम् ।।९९।।**
**नभस्यखण्डाभिषेकादूर्जे दीपोत्सवात्स तु । अक्षय्यफलदो दद्यात् सर्वसिद्धियुतामृतम् ।।१००।।**
**एवं शशंसाखिलतीर्थयात्रां । तेऽपि प्रहृष्टाश्च तथैव चेरुः ।**
**एतादृशं क्षेत्रमिदं वरीयो विज्ञाय विज्ञानमयात्मकोऽस्थात् ।।१०१।।**

(अत्र) द्वारका+उक्त+वत्+आचीर्णात् तस्याः चतुः+गुणं फलम्। अत्र स्नानात् पतितः अपि ज्ञानी भवति। अस्थि चक्रवत् च (भवति)।९८। ग्राम+पूर्व+भागः कल्लेश्वरः। अत्र तु महाबलेशवत् मन्मथ+आख्यं सुसिद्धि+दं तीर्थम्।९९। नभसि अखण्ड+अभिषेकात्, ऊर्जे दीप+उत्सवात् तु अक्षय्य+फलदः सर्व+सिद्धि+युत+अमृतं दद्यात्।१००। एवं अखिल+तीर्थ+यात्रां शशंस। ते अपि प्रहृष्टाः तथा एव चेरुः। इदं एतादृशं क्षेत्रं वरीयः विज्ञाय विज्ञान+मय+आत्मकः अस्थात्।१०१।

द्वारकेला सांगितलेला आचार इथे केल्यास द्वारकेच्या चौपट फळ मिळते. इथे स्नान केल्याने पतितही ज्ञानी होतो आणि त्याच्या अस्थी चक्रांकित होतात.९८. गाणगापूरच्या पूर्वभागात कल्लेश्वराचे मंदिर आहे. इथे गोकर्ण महाबळेश्वरासारखे सिद्धिप्रद मन्मथ तीर्थ आहे. इथे श्रावण महिन्यात शंकराला अखंड अभिषेक केल्याने तसेच कार्तिक महिन्यात दीपोत्सव केल्याने सर्व सिद्धी आणि मोक्ष लाभतात.

अशी ही परिपूर्ण तीर्थयात्रा श्रीगुरूंनी त्या लोकांना सांगितली. त्यांनीही आनंदभराने तसेच आचरण केले. असे हे क्षेत्र महान् आहे हे जाणून समस्तज्ञानस्वरूप श्रीगुरू तिथे राहिले.१०१. (पुढच्या अध्यायात) म्लेच्छाचा उद्धार करून भाविकांसाठी कामधेनूच असलेले श्रीगुरू तिथेच राहिलेले आहेत. साक्षात् परमेश्वर असूनही अज्ञानाच्या अंधाराने आंधळ्या झालेल्या जनांना ते दिसत नाही, जसा जन्मांधाला सूर्य दिसत नाही.

**म्लेच्छं समुद्धृत्य ततोऽखिलात्मा तत्र स्थितो भाविककामधेनुः ।**
**प्रत्यक्ष ईशोऽपि न दृश्यतेऽसाववित्तमोऽन्धैररुणो यथान्धैः ।।१०२।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे क्षेत्रमाहात्म्यवर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः द्वाविंशोऽध्यायः ।।**

ततः म्लेच्छं समुद्धृत्य अखिल+आत्मा भाविक+कामधेनुः तत्र स्थितः। असौ प्रत्यक्ष ईशः अपि अवित्+तमः+अन्धैः न दृश्यते, यथा अन्धैः अरुणः।१०२।

मागील श्लोकांत सांगितलेले अमृतत्व (मोक्ष) सापेक्ष (relative) समजावे. कारण ते पुण्याने उत्पन्न होते म्हणजे ते गृहादिकांसारखे नाशिवंतच होय. 'प्रलयानंतरही जे राहते त्या स्थानाला अमृतत्व म्हणतात,' *(आभूतसंप्लवं स्थानममृतत्ववमिति भाष्यते)* या विष्णुपुराणाच्या (२:८:९६) व्याख्येनुसार हे आत्यंतिक (absolute) अमृतत्व ठरत नाही. आत्यंतिक अमृतत्व आत्मसाक्षात्कार. ते पुरोडाशाप्रमाणे उत्पाद्य नाही, सोमासारखे विकार्य नाही, मंत्रासारखे प्राप्य (सिद्ध करणे) नाही किंवा साळीसारखे संस्कार्य नाही. 'जीवमात्रांमध्ये स्थित असलेला एकच आत्मा आहे.' *(एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः।)* या ब्रह्मबिंदूपनिषदाच्या(१२) वचनानुसार आत्मा एकमेव, सम आणि अविनाशी आहे. 'सर्वच भूतांमध्ये सारखाच अवस्थित असलेला आत्मा' असे गीतेचेही(१३:२७) वचन आहे. अशा आत्म्याला कसली आशा वा अपेक्षा असूंच शकत नाही. केवळ मिथ्या ज्ञानानेच त्याला अशा आशा-अपेक्षा होऊं शकतात. आकाशाप्रमाणे निष्क्रिय, दुःखाचा संसर्गही नसलेल्या परमानंदस्वरूप आत्म्याला, 'मला दुःख होऊं नये, मला सुख व्हावे,' अशी इच्छा किंवा 'माझे शरीर बलशाली आहे, मी समर्थ आहे' असा अभिमान मिथ्याज्ञानाविना संभवतच नाही. मिथ्याज्ञान असलेल्या आत्म्यालाच, 'मला पत्नी असावी म्हणजे मला संतति होईल, मला संपत्ती मिळावी म्हणजे मी कर्मे करीन' (बृहदारण्यक उपनिषद १:४:१७) असे वाटते. कारण तो स्वतःला यांच्यावांचून अपूर्ण मानतो. जेव्हां

त्याच्या जायादि कोणत्याच बाह्य इच्छा पूर्ण होत नाहीत तेव्हां तीच श्रुति त्याला त्याचे 'मन हाच आत्मा, वाचा हीच जाया, प्राण हीच संतति' इत्यादि संपत्तींचा निर्देश करते. हे अज्ञानाचेच लक्षण आहे. कारण मन इत्यादींविषयी आत्मत्वादि अभिमान अज्ञानांतूनच उगम पावतो. जसा बाह्यकामिनी न मिळालेला पुरुष झोंपेत मनानेच कल्पिलेल्या कामिनीचा उपभोग घेतो तसा स्वर्गादींची इच्छा करणारा यज्ञांचे अनुष्ठान करून स्वप्नतुल्य अशा सातिशय पण अनित्य अशा स्वर्गसुखांत निमग्न होतो. त्याला स्वर्गलोकांतून परत भूलोकांत यावेच लागते. मुंडकोपनिषदांत (१:२:९-१०) सांगितल्याप्रमाणे, 'आसक्तीने कर्म करणाऱ्या लोकांना सत्याचे ज्ञान नसल्याने, त्यांनी कर्मांनी प्राप्त केलेल्या लोकांपासून (त्या कर्माचे फळ संपल्यावर) ढळतात आणि खालच्या लोकांत पडतात. त्या विमूढांना इष्ट आणि पूर्त हेच श्रेष्ठ वाटतात. दुसरे कांही श्रेयस्कर कर्म ते जाणतच नाहीत. आपल्या कर्मांनी कमावलेल्या स्वर्गलोकातील सुखांचा भोग घेऊन ते परत ह्या भूलोकांत येतात किंवा आणखी खालीही जाऊं शकतात.' भगवद्गीतेतही (९:२१) *'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलाकं विशन्ति। '* असे म्हटले आहे.

याप्रमाणे मुमुक्षु जर मंदप्रज्ञ असेल तर त्याला श्रुति स्वर्गसाधनभूत यज्ञांचा उपदेश करते. तो मुमुक्षु जर ज्ञानी असेल तर श्रुति त्याला अध्यात्मयज्ञाच्या अनुष्ठानाचा उपदेश करते. त्याचप्रमाणे काशीला जाण्याला अशक्त असणाऱ्या पण आत्मशुद्धीची इच्छा असणाऱ्यांना त्यांच्या निकटच असलेल्या सर्व तीर्थ आणि देवतांनी युक्त अशा स्थानाला 'हीच काशी' असे सांगून त्या गाणगापूरचे काशीशी असलेले साम्य प्रकट केले. हा झाला वरील तीर्थनिरूपणाचा बाह्य अर्थ.

**तीर्थनिरूपणाचा आंतरिक अर्थ -** कलियुगांतील मंदबुद्धीच्या मानवांना देहांतच विद्यमान असलेल्या संसारांतून तरण्याचे ध्यानादि उपाय (तीर्थे) ठाऊक नाहीत. म्हणून त्यांना जाणवून देण्यासाठी श्रीगुरु त्यांना म्हणाले. ७५. काशी म्हणजे प्रकाशणारे, तेजस्वी म्हणजेच ज्ञान असा अर्थ घेऊन, काशीला जाऊं इच्छिणाऱ्या म्हणजे ज्ञानाची जिज्ञासा,

मुमुक्षा असणाऱ्या लोकांना उद्देशून ते म्हणातात. ‘सर्व तीर्थे (ज्ञानाची साधने) इथे ह्या गंधर्वनगरांत - म्हणजेच दृष्टनष्टस्वरूप देहांतच आहेत.’ ७६. इडा, पिंगला आणि सुषुम्णा (*इडा भगवती गङ्गा पिंगला यमुना नदी। तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती।।* पद्मपुराण) ह्यांचा संगमभूत हे आज्ञा चक्र हेच प्रयाग आहे. सात्त्विकभावरूपी अष्ट तीर्थे इथे आहेत. सुषुम्णा मार्गावरील मूलाधारादि सहा चक्रे हीच ह्या संगमाचे सहा कांठ आहेत. ही सुषुम्णाच क्रममुक्तीरूप इष्टफल देणारी अमरजा नदी होय. कठोपनिषदांत (२:३:१६) सांगितल्याप्रमाणे ‘हृदयांतून जाणाऱ्या शंभर नाड्यांपैकी मस्तकांतून बाहेर पडणारी हीच एक नाडी आहे. तिच्यांतून वर जाणाराच अमृतत्व पावतो.’ किंवा त्रिवेणीसंगम म्हणजे ‘तत्’, ‘त्वं’ आणि ‘असि’ ह्या तीन पदांचा योग असणारे महावाक्य असाही अर्थ करतां येतो.७७.जालंधरासुर मनाच्या स्वाभाविक वृत्ती (instincts) आणि त्यांच्या विरुद्ध प्रकाशरूप देव यांच्यांतल्या छांदोग्य उपनिषदांत (१:२:१) वर्णन केलेल्या युद्धांत, *‘इंद्रायेन्द्रो परिस्रव’* (ऋग्वेद ८:९१:३) वचनानुसार ईश म्हणजे आत्म्याने, इन्द्र म्हणजे जीवाला दिलेले म्हणजे सहस्रार चक्रांतून स्रवणारे अमृत जाणावे. ७८. स्वरूपाचे विस्मरण (प्रमाद) हाच कालमृत्यु; ज्याच्यामुळे भय होते ते द्वैत हेच **भय** शब्दाने सूचित केले आहे. **अघ** म्हणजे आत्म्याच्या हत्येचे पाप. निर्दोष माणसावर मिथ्यारोप करणे हा त्याची शस्त्रावांचून केलेली हत्याच ठरते. तद्वत् नित्य, शुद्ध बुद्ध आत्मस्वरूपावर पापित्वादि आरोप (अध्यास) ही त्याची हिंसाच होय. *‘असुर्या नाम ते लोका’* या ईशावास्योपनिषदाच्या मंत्रावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी असे म्हटले आहे कीं, ‘अविद्येच्या दोषाने विद्यमान आत्म्याचा तिरस्कार केल्याने विद्यमान आत्म्याची अजर, अमर इत्यादि लक्षणे जाणीवेतून जातात. एखाद्याला ठार केल्यावर त्याचा प्रभाव नाहीसा होतो तसेच हे आहे. यासाठीच प्राकृत अज्ञानी जीवांकडून आत्म्याच्या हत्येचे पाप घडते.’ महाभारतांतही *‘किं तेन न कृतं पापं चोरणात्मापहारिणा।’* असे म्हटले आहे. ७९. मनोरथ तीर्थ म्हणजे भक्ति. संतोष हेच संतोषतीर्थ. *रुतं* म्हणजे शोक त्याला *द्रावयति* म्हणजेच पळवतो तो **रुद्र** अर्थात् सात्त्विक अहंकार. नेहमी त्याच्याबरोबरच राहणारा आणि आनंददायी विवेक म्हणजेच **नंदी**.

८०. **शैवी प्रदक्षिणा** याचा अर्थ श्रवण, मनन, निदिध्यासन यांची वरचेवर केलेली आवृत्ती. ८१. **ईश** म्हणजे आत्मा त्याचे दर्शन म्हणजे ' तोच मी आहे' अशी अपरोक्ष अनुभूति. तिच्यामुळे होणारी इष्टप्राप्ती आणि अनिष्टनिवृत्ती वर सांगितलीच आहे. ८२. पुढे ९३ व्या श्लोकापर्यंत सांगितलेला इतिहास विश्वास निर्माण व्हावा यासाठी सांगितला आहे. रत्नाबाईचे कुष्ठ हे जन्ममरणरूपी संसाराचेच रूपक आहे. तिला तीन दिवस स्नान करायला सागितले ज्ञानाभ्यासाचेच उपलक्षण आहे.९४. **कोटितीर्थ** म्हणजेच गीतेत 'या ज्ञानासमान पवित्र या जगांत कांहीच नाही (*न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।)'* असे गौरविलेले विशुद्ध ज्ञान.९५. 'या इथे **संक्रमणं** ह्याचा अर्थ इडा आणि पिंगला यांचे सम्यक् क्रमण. इडेचे क्रमण करून प्राण मूलाधाराशीं आला कीं चंद्रग्रहण, पिंगलेंतून मूलाधारांत प्राण आला कीं सूर्यग्रहण, इडा-पिंगलांच्या संधीला (आज्ञाचक्र) प्राण पोंचला कीं अमावास्या, इडेंतून प्राण पिंगलेंत जाणे दक्षिणायन व पिंगलेंतून इडेंत प्राणाचे गमन हे उत्तरायण असे सूतसंहितेंत वर्णन आहे. त्याचा दाखला श्रीस्वामीमहाराजांनी टीकेंत पुढे दिला आहे.९६. उदरालंबन म्हणजे नाभीजवळचे मणिपूर चक्र हीच **गया.** पांच छिद्रांचे हृत्कमल (अनाहत चक्र) हीच द्वारका. कारण तिथेच श्रीकृष्णपरमात्म्याचे वास्तव्य आहे.९७-९८. सुसिद्धिदं (उत्तम सिद्धि देणारे) मन्मथक्षेत्र म्हणजेच ब्रह्मरंध्र (सहस्रार चक्र होय). किंवा अनाहताला **मन्मथ क्षेत्र** आणि ब्रह्मरंध्राला द्वारका असा व्यत्यास केला तरी चालेल. आत्मपुराणांत म्हटले आहे, *'स देवदेवजनकः कपालत्रयमध्यमां। सिमंतिनीनां सीमंते सीमांता विदितां नृणाम्। ततो मनुष्यमात्रस्य पुरा द्वारवती स्मृता। अस्यां यस्मादयं कृष्णः पुराणपुरुषोऽविशत्। ऊर्ध्वभागे ततो द्वारं विद्वद्भिः कीर्त्यते बुधैः।।'* 'तीन कपाळांच्या मध्यभागी स्त्रियांच्या भांगाजवळच्या सीमेला मनुष्यमात्रांची द्वारवती (द्वारका) आहे. त्याच्या वरच्या भागीं ज्ञानी लोकांनी वर्णन केलेले द्वार (ब्रह्मरंध्र) आहे. तो देवदेवांचा (ब्रह्मदेवाचा) पिता, जीवभूत श्रीकृष्णपरमात्मा या ब्रह्मरंध्रांचा भेद करूनच देहामध्यें प्रवेश करतो. त्यामुळे हीच मनुष्यमात्रांची द्वारका होय'१००. असे सर्व नरदेहाचे माहात्म्य श्रीगुरूंनी सांगितल्याने आणि मोक्षमार्गाची सुगमता कळाल्याने ते लोक आनंदित झाले.

हे क्षेत्र, म्हणजे गंधर्वनामक हा देह, श्रेष्ठ आहे. विज्ञान म्हणजे बुद्धी ज्याची उपाधि आहे असे आत्मस्वरूप तिथे अवस्थित आहे. १०१. इथे असा प्रश्न उपस्थित केला जाऊं शकतो की *'द्वा सुपर्णा'* (ऋग्वेद १:१६४:२०) या श्रुतींत दोघांचे अस्तित्व प्रतिपादले असतांना इथे एकाचाच निर्देश कसा केला? त्याचा खुलासा प्रस्तुत श्लोकांत केला आहे. तो अखिलात्मा असूनही प्रतिबिंबरूप असल्याने उपाधीच्या मालिन्याने म्लेच्छ म्हणजे अस्पष्ट उच्चार करणारा - अस्पष्ट आविष्कृत होणारा चिदाभास, त्याचा उद्धार करून शुद्ध आत्मस्वरूपच हार्दाकाशांत स्थिरावले असा आशय आहे. १०२.

प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ त्रयोविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधु साधूदितं क्षेत्र-माहात्म्यं लोकपावनम् । जगन्निवासो भगवान् यत्रोवासैष लीलया ।।१।।**
**तत्र तत्राखिला देवा ऋषियोगिमुनीश्वराः । निवसन्ति पुनस्तत्र ननु तीर्थानि सर्वशः ।।२।।**
**कृष्णापञ्चनदीयोगो धन्योऽन्योऽप्येष तादृशः । स भीमामरजायोगः साक्षात्तु भगवानिह ।।३।।**
**पशुपक्षिमृगा मीनास् तत्रत्याः स्नानपानतः । धन्या एव पुनर्नृणां धन्यत्वं किमु वर्ण्यते ।।४।।**

नामधारक उवाच। लोक+पावनं क्षेत्र+माहात्म्यं साधु साधु उदितम्। एष जगत्+निवासः भगवान् यत्र लीलया उवास।१। तत्र तत्र अखिलाः देवा++ऋषि+योगि+मुनि+ईश्वराः निवसन्ति। पुनः तत्र सर्वशः तीर्थानि (अपि निवसन्ति)।२। कृष्णा+पञ्चनदी+योगः धन्यः। अन्यः अपि तादृशः एष भीमा+अमरजा+योगः सः भगवान् तु इह साक्षात् (वर्तते)।३। तत्रत्याः पशु+पक्षि+मृगा+मीनाः स्नान+पानतः धन्याः एव। पुनः नृणां धन्यत्वं किम् उ वर्ण्यते?४।

श्रीगणेशाय नमः। *तेविसाव्यांत म्लेच्छ राजाचा करूनि उद्धार। अदृश्य झाला अभक्तांना, परि प्रत्यक्ष आजही भक्तांना।।२३।।* श्रीगुरू उगी राहिलेले पाहून नामधारक दहा श्लोकांत त्यांना विचारीत आहे. 'छान छान! सर्व जनांना पावन करणारे क्षेत्रमाहात्म्य आपण फार उत्तम सांगितलेत. हा जगन्निवास भगवंत लीलेने जिथे जिथे निवास करतो,(१) तिथे तिथे सर्व देव, ऋषी, मुनी राहतात. त्यांच्याबरोबरच साहजिकच सर्व तीर्थेही तिथे येतात.२. कृष्णा आणि पञ्चगंगा यांचा संगमही श्रीगुरूंच्या निवासाने धन्य झाला आहे. तसाच हा दुसरा भीमा आणि अमरजा यांचा संगम भगवंताच्या साक्षात् वास्तव्याने धन्य झाला आहे.३. या संगमाच्या जलात स्नान करून आणि ते पिऊन येथील पशू, पक्षी आणि जलचरही धन्य झाले आहेत. मग येथील मानवांची धन्यता किती म्हणून वानावी?४.

**यन्माहात्म्यश्रवणतो लीयन्ते पापराशयः । किं पुनस्तन्निवसतां सतां वाच्या हि सद्गतिः ।।५।।**
**भगवद्भक्तियुक्ता ये मुक्तिस्तेषां करे स्थिता । मुक्तिं ते परिभाव्यातो भक्तिमेवाश्रयन्त्यरम् ।।६।।**
**मुक्त्यपेक्षा पुराभून्मे सा भवत्कृतबोधतः । व्यपेता दूरतो वृद्धाहैतुकीभक्तियोगतः ।।७।।**
**अतः प्रियतमं विष्णोः कीर्तनश्रवणादिकं । तद्गुणश्रवणं श्राव्यं रोचते मे विशेषतः ।।८।।**
**तस्मात्स्वर्गायचरित-पूरितात्मन्वदस्व मे । श्रीगुरोश्चरितं रम्यं मङ्गलं पावनं परम् ।।९।।**
**को म्लेच्छः सोऽतिहीनोऽपि कृपापात्रं परात्मनः । कथं जातो हि भवता यत्तूक्तं म्लेच्छ उद्धृतः ।।१०।।**

यत्+माहात्म्यं श्रवणतः पाप+राशयः लीयन्ते तत्+निवसतां सतां सद्गतिः हि किं पुनः वाच्यते?५। 'ये भगवत्+भक्ति+युक्ता मुक्तिः तेषां करे स्थिता। अतः ते मुक्तिं परिभाव्य अरं भक्तिं एव आश्रयन्ति।६। पुरा मे मुक्ति+अपेक्षा अभूत्। सा भवत्+कृत+बोधतः अहैतुकी+भक्ति+योगतः दूरतः व्यपेता।७। अतः विष्णोः कीर्तन+श्रवण+आदिकं प्रियतमम्। तत्+गुण+श्रवणं मे विशेषतः रोचते।८। तस्मात् (हे) स्वर्गाय+चरित+पूरित+आत्मन्, मे श्रीगुरोः रम्यं, मङ्गलं पावनं परं चरितं वदस्व।९। कः सः म्लेच्छः? अति+हीनः अपि पर+आत्मनः कृपा+पात्रं जातः? यत् हि भवता उक्तं 'म्लेच्छ उद्धृतः।'१०।

ज्या गाणगापूर क्षेत्राचे माहात्म्य कानांवर पडल्यानेही पापांच्या राशी नष्ट होतात तिथे राहणाऱ्या सज्जनांच्या सद्गतीविषयी कितीही वर्णन केले तरी अपुरेच ठरणार आहे.'५. 'भगवंताची भक्ती ज्यांना लाभली आहे त्यांना मुक्ती करतलावरच असते. म्हणून ते मुक्तीचा अनादर करून भक्तीचाच आश्रय करतात.६. मलाही पूर्वी मुक्तीची अपेक्षा होती. पण आपण केलेल्या उपदेशाने ही अहैतुकी भक्ती प्राप्त झाल्याने मुक्तीची इच्छा दूर झाली.७. आता मला सर्वव्यापी श्रीगुरूंचे कीर्तन, श्रवण, अर्चन इत्यादि अत्यंत प्रिय वाटतात. विशेषतः त्यांच्या गुणांचे श्रवण मला फारच आवडते!८. त्याकरिता स्वर्गातही गायल्या जाणाऱ्या गुरुचरित्राने ज्यांची बुद्धी संपृक्त झाली आहे अशा सिद्धमुने, मला श्रीगुरूंचे रम्य, मंगल आणि पावन चरित्र सांगा.९. तो म्लेच्छ कोण जो श्रीगुरुपरमात्म्याच्या कृपेला पात्र झाला? कारण आपण म्हणत होता की एका म्लेच्छाचा श्रीगुरूंनी उद्धार केला!'१०.

**॥ सिद्ध उवाच ॥**

**धन्योऽसि तेऽद्य भगवत्प्रसादान्मतिरीदृशी । अतस्तच्चरितं वक्तुमानन्दोऽतीव वर्धते ॥११॥**
**यदा स्थितः कुरुपुरे प्रत्यक्षं श्रीपदस्तदा । रजकः प्रत्यहं भेजे तं स्तोत्रैर्नतिभिः सदा ॥१२॥**
**कदाचिदाह तं तुष्टः श्रीपादो भाविकोऽसि रे । कुर्वकण्टकसाम्राज्यं तच्छ्रुत्वा सोऽतिहर्षितः ॥१३॥**
**सोऽलङ्कृतं नृपं नद्यां क्रीडन्तं युवतीयुतम् । चतुरङ्गबलोपेतं दृष्ट्वा स्वगतमब्रवीत् ॥१४॥**

सिद्ध उवाच। धन्यः असि! अद्य भगवत्+प्रसादात् ते ईदृशी मतिः। अतः तत्+चरितं वक्तुं आनन्दः अतीव वर्धते।११। यदा कुरुपुरे प्रत्यक्षः श्रीपदः स्थितः तदा रजकः तं प्रति+अहं सदा स्तोत्रैः नतिभिः भेजे।१२। कदाचित् तुष्टः श्रीपदः तं आह, 'रे, भाविकः असि। अकण्टकं साम्राज्यं कुरु!' तत् श्रुत्वा सः अति+हर्षितः।१३। सः नद्यां क्रीडन्तं अलङ्कृतं युवतीयुतं चतुः+अंग+बल+उपेतं नृपं दृष्ट्वा स्व+गतं अब्रवीत्।१४।

वरच्या श्लोकांतले **स्वर्गाय** पद वेगळे काढून स्वर्गासाठी - कर्मनिष्ठांसाठी स्वर्गप्राप्ती आणि मुमुक्षूसाठी (सु+अर्ग) चांगल्या ज्ञानप्राप्तीसाठी जे गाइले जाते असा दुहेरी अर्थ करता येतो.

सिद्धमुनी उत्तरले, 'धन्य आहेस! आज भगवंताच्या प्रसादानेच तुला अशी बुद्धी झाली आहे. त्यामुळे त्या श्रीगुरूंचे चरित्र सांगण्याला मला अतीव आनंद वाटतो आहे.'११. श्रीगुरू (सातव्या अध्यायात सांगितलेल्या) कुरुगड्डीला असताना एक परीट प्रतिदिन सदा श्रीगुरूंची नमस्कार आणि स्तोत्र यांसह सेवा करीत असे.१२. त्या सेवेने संतुष्ट झालेले श्रीगुरू एकदा त्याला म्हणाले, 'अरे रजका, तू भाविक आहेस! तू अकंटक (शत्रूरहित) साम्राज्याचा अधिपती होशील!' ते ऐकून त्याला खूप आनंद वाटला.१३. त्याने एकदा एक वस्त्रे आणि भूषणे यांनी सजलेला यवन राजा नदीत क्रीडेला आलेला पाहिला. त्याच्याबरोबर अनेक तरुण स्त्रिया, चतुरंग सेना इत्यादि राजपरिवारही होता.१४.

**गुरुः कोऽस्य कुतस्त्वीदृग्-भाग्यं तज्जीवितं वरम् । क्व वार्तास्य मयीत्येतज्-ज्ञात्वा श्रीपाद आह तम् ॥१५॥**
**ज्ञातं ते हृद्गतं त्वत्र जरन्नार्होऽसि जन्मनि । राज्यं भोक्तुमतो भुङ्क्ष्व जन्मन्येष्येऽर्पितं ध्रुवम् ॥१६॥**
**सम्मतं भवदुक्तं हि यूनो राज्यरसज्ञता । राज्येऽप्यस्तु स्मृतिस्ते म इति तं स स्म याचते ॥१७॥**
**श्रीपादोऽपि तथेत्यूचे प्रेत्यापि रजकस्ततः । वैडूर्यनगरे म्लेच्छः सार्वभौमोऽभवन्नृपः ॥१८॥**

'अस्य गुरुः कः? कुतः ईदृक् भाग्यम्? तत् जीवितं वरम्! मयि अस्य क्व वार्ता?' एतत् ज्ञात्वा श्रीपाद तं आह।१५। 'ते हृत्+गतं ज्ञातम्। अत्र जन्मनि जरन् राज्यं भोक्तुं अर्हः न असि। अतः एष्ये जन्मनि ध्रुवं (राज्यं) अर्पितम्। भुंक्ष्व।'१६। 'भवत्+उक्तं संमतं हि। यूनः राज्य+रस+ज्ञता। राज्ये अपि मे ते स्मृतिः अस्तु,' इति सः तं याचते स्म।१७। श्रीपादः अपि 'तथा' इति ऊचे। ततः रजकः अपि प्रेत्य वैडूर्यनगरे सार्वभौमः म्लेच्छः नृपः अभवन्।१८।

त्या राजाला पाहून त्याच्या मनात विचार आला, 'कोण ह्या राजाचा गुरू असेल? कसे त्याला एवढे ऐश्वर्य मिळाले असेल? त्याचे जीवन हे खरे जीवन आहे! माझ्यासारख्याला अशा भाग्याची वार्ता तरी कुठली?' त्याच्या मनातील हे विचार श्रीपादप्रभूंनी ओळखले आणि त्याला म्हणाले.१५.

'तुझ्या मनातली वासना मी जाणली आहे. या जन्मात आता तू वृद्ध झाला आहेस. हे वय राज्य भोगण्याला योग्य नाही. तेव्हा तुला पुढच्या जन्मात निश्चयपूर्वक राज्य दिले. ते तू सुखाने भोग!'१६. 'आपले म्हणणे मान्य आहे, महाराज! बालपणी रसचंदनादि भोगांचे अज्ञान असते तर म्हातारपणी ते ज्ञान असूनही ते भोगण्याची शक्ती नसते. त्यामुळे ते सर्व राज्यभोग तारुण्यातच सुखकारक असतात. मात्र त्या राज्यातही मला आपली स्मृती असावी हीच प्रार्थना आहे.' अशी त्याने याचना केली.१७. श्रीपादांनीही 'तथास्तु' म्हणून आशीर्वाद दिला. त्यानंतर थोड्याच काळात तो परीट भक्त मृत्यू पावला आणि त्याचा जन्म बिदर येथे राजघराण्यात झाला. श्रीगुरूंच्या आशीर्वादानुसार तो सार्वभौम यवन राजा झाला.१८.

**म्लेच्छधर्मारुचिः पूर्व-संस्काराद्देवविप्रभाक् । शुद्धात्मा दानधर्मज्ञः सर्वभूतसमोऽभवत् ।।१९।।**
**तं तत्पुरोहिता ऊचुः स्वधर्मं सेवयोत्तमम् । मृषोद्यवर्णधर्मोऽयमग्राह्यो मनसाप्यसन् ।।२०।।**
**मुखाद्यावयवैर्देह-साम्ये वर्णक्रमः कथम् । अचेतनोपलेध्मादौ देवतान्यत्र वा कथम् ।।२१।।**
**राजा तानाह धीमान्द्यमिदं सृष्टं परात्मना । गुणकर्मभिदा चातुर्वर्ण्यं देवस्तु सर्वगः ।।२२।।**

पूर्व+संस्कारात् म्लेच्छ+धर्म+अरुचिः देव+विप्र+भाक् शुद्ध+आत्मा दान+धर्म+ज्ञः सर्व+भूत+समः अभवत्।१९। तं तत्+पुरोहिताः ऊचुः। उत्तमं स्वधर्मं सेवय। अयं वर्ण+धर्मः मृषा+उद्यः मनसा अपि अग्राह्यः असन्।२०। मुखा+आदि+अवयवैः देह+साम्ये वर्ण+क्रमः कथम्? अचेतन+उपल+इध्म+आदौ अन्यत्र वा देवता कथम्?२१। राजा तान् आहे, 'इदं धी+मान्द्यम्! पर+आत्मना गुण+कर्म+भिदा चातुः+वर्ण्यं सृष्टम्। देवः तु सर्वगः।'२२।

बृहदारण्यक उपनिषदात (४:४:२) सांगितल्याप्रमाणे पहिल्या जन्मातील ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन तो जन्माला आला होता. पूर्वजन्मीच्या संस्कारांनी त्याला यावनी धर्माची आवड नव्हती. देवाब्राह्मणांचा तो आदर करीत असे. तो शुद्ध बुद्धीचा, दानधर्माची जाण असलेला, सर्व जीवमात्रात समभाव बाळगणारा असा झाला.१९. त्याला त्याच्या धर्मगुरूंनी सांगावे, 'राजेसाहेब, आपण आपला ह्या उत्तम यवनधर्माचे पालन करावे. हा जो वर्णाश्रमधर्म आहे तो मिथ्या आहे असे आपले धर्मशास्त्र सांगते. तो धर्म मनातही आणू नये इतका वाईट आहे.'२०. ते यावनी पुरोहित पुढे सांगतात, 'तोंड, हात, पाय इत्यादि अवयव सारखेच असताना हा ब्राह्मण, हा क्षत्रिय असे वर्णभेद कसे करतात? गाय, घोडे इत्यादि प्राण्यात त्यांच्या अवयवांवरून, आवाजावरून, त्यांच्या मलाच्या वेगळेपणावरून जसा भेद करता येतो किंवा स्त्री आणि पुरुषांतही योनी, लिंग आदींवरून फरक दिसतो तसा वर्णांमध्ये करता येत नाही. दगड, लाकूड, माती, सोने इत्यादि अचेतन वस्तूंच्या प्रतिमांत तसेच पाणी, अग्नी यांच्यात देवत्व कसे येईल?'२१. राजा त्यांचे म्हणणे खोडून टाकीत म्हणतो, 'हे तुमच्या बुद्धीचे मांद्य आहे. त्यांच्या धर्मग्रंथांत (भ.गीता ४:१३) सांगितल्याप्रमाणे हे चार वर्ण सत्त्व-रज-तम आदि गुणांच्या आणि शमदमादि कर्मांच्या विभागणीने (भ.गीता १८:४२-४४) परमेश्वरानेच केलेले आहेत. आणि देव तर सर्वव्यापी आहे असे तुम्हालाही मान्य आहेच ना? या संपूर्ण जगाचे अधिष्ठान परमात्माच आहे तेव्हा तो चेतन अचेतन अशा सर्वच वस्तूंत आहेच.२२.

**स्थूलाक्षराल्लिपिज्ञानं शिशोरिव परात्मनः । गुरूक्तार्चाकल्पनया हृत्स्थैर्याद्बोध उद्भवेत् ।।२३।।**
**सतोम्ब्वाद्येऽपि बिम्बस्य प्रतीतिर्न मलान्विते । तथात्मनो न मलिने प्रतीतिः सा तु निर्मले ।।२४।।**
**तत्स्वप्रमानादिवेद-प्रोक्तधर्मपरान् द्विजान् । नमस्कुरुत भक्त्या ते देवानामपि देवताः ।।२५।।**
**वेदानुसारिस्मृत्युक्त-धर्मकर्मानुवर्तिनः । पूज्या अतो द्वेषशङ्कां त्यजतेत्याह तान्नृपः ।।२६।।**
**ततः कालेन कियता स्फोटकोऽङ्के समुत्थितः । तेन राड् व्यथितोऽत्यन्तं मोघाभूत्तत्प्रतिक्रिया ।।२७।।**

शिशोः स्थूल+अक्षरात् लिपि+ज्ञानं इव गुरु+उक्त+अर्चा+कल्पनया हृत्+स्थैर्यात् पर+आत्मनः बोध उद्भवेत्।२३। सतः अम्बु+आद्ये बिम्बस्य प्रतीतिः, न मला+अन्विते। तथा आत्मनः मलिने न प्रतीतिः सा तु निर्मले।२४। तत् स्व+प्रम+अन+आदि+वेद+प्रोक्त+धर्म+परान् द्विजान् भक्त्या नमस्कुरुत। ते देवानां अपि देवताः।२५। 'वेद+अनुसारी+स्मृति+उक्त+धर्म+कर्म+अनुवर्तिनः पूज्याः। अतः द्वेष+शंकां त्यजत'इति नृपः तान् आह।२६। ततः कियता कालेन अङ्के स्फोटकः समुत्थितः। तेन राट् अत्यंतं व्यथितः। तत्+प्रतिक्रिया मोघा अभूत्।२७।

मूर्तिपूजेविषयी विचाराल तर लहान मुलांना जशी मोठी अक्षरे शिकवून मग सूक्ष्म लिपीचे ज्ञान करून देतात तसेच गुरूंनी सांगितलेल्या किंवा परंपरेने आलेल्या मूर्तीच्या चिंतनाने मन स्थिर झाल्यावर निराकार परमेश्वराचे ज्ञान होते.२३. पाणी असो वा आरसा असो, स्वच्छ असेल तरच त्यांत आपल्या मुखाचे वगैरे प्रतिबिंब चांगले दिसते. ते मलीन असेल तर तसे दिसणार नाही. त्याचप्रमाणे रागद्वेषादि दोषांनी चित्त मलीन असेल तरच अंतरात्म्याची प्रचीती येते.२४. हे सर्व ज्ञान ज्या वेदांत सांगितले आहे ते स्वतःप्रमाण आणि अनादि आहेत. अशा वेदांत सांगिलेल्या धर्माचे अनुसरण करणाऱ्या ब्राह्मणांना भक्तीपूर्वक नमस्कार करावा. ते देवांचेसुद्धां देव आहेत.' २५. 'वेदांनाच अनुसरणाऱ्या स्मृतींनी ग्रथित केलेल्या धर्मांचे आणि कर्मांचे अनुशीलन करणाऱ्यांचा आदरच केला पाहिजे. तरी तुम्ही त्यांचा द्वेष करू नका.' असे राजाने त्या पुरोहितांना समजावले.२६. पुढे कांही काळ गेल्यावर राजाच्या मांडीवर एक मोठा फोड झाला. त्याने राजा अगदी त्रासून गेला. त्याच्यावरे कांहीच उपाय चालेनात.२७.

**राजा यातनया त्यक्त-भुक्तिसुप्तिरतिर्द्विजम् । आहूय तत्प्रतीकारं पप्रच्छ विनयान्वितः ॥२८॥**
**स प्राह नात्र वक्तव्यं भवान्म्लेच्छो द्विजोऽस्म्यहम् । जनश्रुतिभियैकान्ते वक्तव्यं भूपसत्तमम् ॥२९॥**
**अथापतुरुभौ पाप-नाशतीर्थं द्विजोऽब्रवीत् । भो पूर्वार्जितदुष्कर्म-योगाद्रोगसमुद्भवः ॥३०॥**

यातनया त्यक्त+भुक्ति+सुप्ति+रतिः राजा द्विजं आहूय विनय+अन्वितः तत्+प्रतीकारं पप्रच्छ।२८। सः प्राह, '(हे) भूप+सत्तम, भवान् म्लेच्छः, अहं द्विजः अस्मि। अत्र न वक्तव्यम्। जन+श्रुति+भिया एकांते वक्तव्यम्।' २९। अथ उभौ पाप+नाश+तीर्थं आपतुः। द्विजः अब्रवीत्, 'भो (राजन्) पूर्व+अर्जित+दुः+कर्मात् रोग+समुद्भवः।'३०।

त्या फोडाच्या वेदनांनी राजाला खाणे-पिणे, झोप किंवा कामसेवन सुचेनात. तेव्हा त्या राजाने एका ब्राह्मणाला बोलावून त्या फोडावर उपाय विचारले.२८. तो ब्राह्मण त्याला म्हणाला, 'राजेसाहेब, आपण यवन जातीचे आहात आणि मी तर ब्राह्मण आहे. इथे आपण बोललो तर त्याचा उगीच बोभाटा होईल. तेव्हा आपण एकांतात कुठे तरी जाऊन बोलू या.'२९.

**जन्मांतराने कर्माचा भोग -** राजाला त्याचे म्हणणे पटले आणि ते दोघेही बिदरजवळच्या पापनाशी तीर्थाला गेले. तो ब्राह्मण सांगू लागला, 'माणसाला जे कांही रोग होतात ते पूर्वजन्मींच्या पापकर्मामुळेच होतात.' एका जन्मात केलेली दुष्कर्मे दुसऱ्या जन्मातल्या रोगांचे कारण कसे होतात? अशी शंका घ्यायचे कारण नाही. मृत्यू याचा अर्थ पाचभौतिक देहातून जीवाचे निष्क्रमण. देहापासून जीव वेगळा होतो. देह जरी महाभूतात विलीन झाला तरी आत राहणारा पुरुष तसाच राहतो. जोपर्यंत आत्मज्ञान होत नाही तोपर्यंत तो पुनःपुनः जन्मतो आणि मरण पावतो. छांदोग्य उपनिषदानसार 'त्याची वाचा मनात मिळून जाते, मन प्राणात, प्राण तेजात आणि तेज परदेवतेत मिळून जातात.' वर उद्धृत केलेल्या बृहदारण्यक उपनिषदाच्या मंत्राप्रमाणे '*जीव बाहेर पडला की सर्व प्राण त्याच्यामागे जातात. तो त्याचे ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन जातो.*' प्रश्नोपनिषदांत सांगितले आहे, (हृदयातील एकशे एक नाड्यांपैकी) एका वर जाणाऱ्या नाडीतून..

**दानभेषजसत्तीर्थ-देवसेवादिभिर्भवेत् । तच्छान्तिः साधुदृष्ट्यापि सर्वाघहृतिदक्षया ।।३१।।**
**पुरावन्तीपुरे धर्म-हीनोऽभूद्ब्राह्मणब्रुवः । त्यक्तकर्मा पिङ्गलाख्य-वेश्यासक्तो मदोद्धतः ।।३२।।**

तत्+शान्तिः दान+भेषज+सत्+तीर्थ+देव+सेवादिभिः भवेत्। सर्व+अघ+हृति+दक्षया साधु+दृष्ट्या अपि (तत्+शांतिः भवेत्)। पुरा अवन्तीपुरे धर्म+हीनः त्यक्त+कर्मा पिङ्गला+आख्य+वेश्या+सक्तः मद+उद्धतः ब्राह्मण+ब्रुवः अभूत्।३२।

.. उदान (नावाचा प्राण) पुण्य अधिक असेल तर पुण्यलोकांना नेतो, पाप अधिक असेल तर पापलोकांना नेतो आणि दोन्ही समान असतील तर मनुष्यलोकाला. प्राण तेजासह आत्म्याला यथासंकल्पित लोकाला नेतो.' कठोपनिषदातही (२:२:७) असेच प्रतिपादन आहे. 'आपापल्या कर्मानुसार आणि शास्त्राध्ययनानुसार जीव त्या त्या योनी पावतात.' या सर्व आगमप्रमाणांवरून कर्माचे फल देणाऱ्या ईश्वराच्या प्रेरणेने जन्मांतराचे पापच रोगादि दुःखांचे कारण आहे.३०. 'त्या रोगांचे उपशमन करण्याचे उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. **१. दान -** श्रद्धेने सत्पात्री (योग्य व्यक्तीला) केलेला धनत्याग; **२. भेषज -** आयुर्वेदात सांगितलेले औषध; **३. सत्** साधुसंत, **तीर्थ** गंगादि तीर्थस्थाने आणि **देव** विष्णू, शंकर इत्यादि यांच्या सेवेने; आदि शब्दाने जप, होम इत्यादि घ्यावेत. **४.** शेवटी सर्व पापांचे निवारण करणाऱ्या साधूच्या केवळ कृपाकटाक्षानेही रोगाची शांती होते.'३१. साधूची नुसती दृष्टी जरी पडली तर रोग कसा बरा होतो याविषयी एक आख्यान तो ब्राह्मण राजाला सांगत आहे. पूर्वी उज्जयनी नगरीत एक केवळ नामधारी ब्राह्मण राहत होता. त्याने सर्व धर्म-कर्म यांचा त्याग केला होता. पिंगला नावाच्या वेश्येत त्याचे मन अडकले होते. तो तिच्यासहच राहत असे. पैशाच्या मदाने तो उद्धट झाला होता.३२.

**तत्प्राक्पुण्यचयाद्योगी ऋषभः प्राप तत्र तौ । सेवयामासतुः प्रेम्णा पादसंवाहनादिभिः ।।३३।।**
**स्तुतोऽर्चितो भोजितोऽनु पर्यङ्के शायितोऽमले । पीततत्पादतीर्थाभ्यां तुष्टः सुष्वाप वीजितः ।।३४।।**
**सुप्तोऽपि नमितः प्रातरुत्थायागात्स संस्तुतः । इयत्पुण्येन तौ प्रेत्य जातौ ब्रह्मकुलेऽमले ।।३५।।**
**वज्रबाहोर्दशार्णेशो महिष्याः कुक्षिमाप सः । तत्सपत्नी तदा द्वेषाद् गर्भिण्यै गरलं ददौ ।।३६।।**

तत्+प्राक्+पुण्य+चयात् ऋषभः योगी तत्र प्राप। तौ प्रेम्णा पाद+संवाहनादिभिः सेवयामासतुः।३३। पीत+तत्+पाद+तीर्थाभ्यां स्तुतः अर्चितः भोजितः अनु अमले पर्यंके शायितः तुष्टः।३४। सुप्तः अपि नमितः। प्रातः उत्थाय सः संस्तुतः अगात्। इयत् पुण्येन तौ प्रेत्य अमले ब्रह्म+कुले जातौ।३५। सः दशार्ण+ईशः वज्रबाहोः महिष्याः कुक्षिं आप। तदा तत्+सपत्नी द्वेषात् गर्भिण्यै गरलं ददौ।३६।

त्याच्या कांही पूर्वपुण्याईने तिथे एकदा महान योगी ऋषभदेव आले. त्या ब्राह्मणाने आणि त्या वेश्येने मिळून त्यांची प्रेमाने, पाय चेपून वगैरे सेवा केली.३३. त्यांच्या पायाचे तीर्थ घेतले. त्यांची गोड शब्दांनी स्तुती केली; पूजा केली; त्यांना जेवायला घातले; आणि चांगल्या पलंगावर त्यांची झोपायची सोय केली; त्यांना पंख्याने वारा घातला. अशा रीतीने त्यांनी त्या मुनींना प्रसन्न केले.३४. ते झोपल्यावरही त्यांनी जागून त्यांची झोपमोड होऊ दिली नाही. ते उठल्यावर त्यांना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. त्यानंतर ते ऋषभदेव आले तसे आपल्या वाटेने निघून गेले. त्या ऋषिसेवेच्या पुण्याईने ते दोघेही मृत्यूनंतर शुद्ध राजकुलात जन्माला आले.३५. ती वेश्या दशार्ण देशाचा राजा वज्रबाहू याची पट्टराणी झाली आणि तो ब्राह्मण तिच्या पोटी आला. तेव्हा तिच्या सवतीने मत्सराने त्या गरोदर राणीला विष घातले.३६.

**तेन विद्धापि न मृता दैवात्सा सुषुवे सुतम् । बालोऽपि विषविद्धोऽभूदुभौ जातौ व्रणाङ्कितौ ।।३७।।**
**तदार्तिर्न शशामापि नानोपायैरुभौ सदा । क्रन्दमानौ निराहार-निद्रौ क्षीणौ तु कृच्छ्रतः ।।३८।।**
**राजैकदा पूतिगन्धि-त्रस्तस्तद्वीक्षणात् क्षणात् । सूतमाज्ञाप्य सार्भां तां गमयामास कानने ।।३९।।**
**घोरेऽरण्येऽपि तौ त्यक्त्वा राज्ञे सूतः शशंस तत् । ततो रेमेऽन्यभोगिन्या क्रूरो राजातिहृष्टया ।।४०।।**
**घोरसत्त्वे वने राज्ञी विजने व्रणकर्शिता । अज्ञाताङ्घ्रिगतिस्तन्वी त्रस्ताभूत्कण्टकोपलैः ।।४१।।**

(सा) तेन विद्धा अपि न मृता। सा दैवात् सुतं सुषुवे। बालः अपि विष+विद्धः अभूत्। उभौ व्रण+अङ्कितौ जातौ।३७। तत्+आर्तिः नाना+उपायैः अपि न शशाम। उभौ सदा क्रंदमानौ निः+आहार+निद्रौ कृच्छ्रतः तु क्षीणौ।३८। एकदा राजा तत्+वीक्षणात् पूति+गन्ध+त्रस्तः क्षणात् सूतं आज्ञाप्य तां स+अर्भां कानने गमयामास।३९। सूतः अपि तौ घोरे अरण्ये त्यक्त्वा राज्ञे शशंस। ततः क्रूरः राजा अति+हृष्टया अन्य+भोगिन्या रेमे।४०। घोर+सत्त्वे विजने वने व्रण+कर्शिता अ+ज्ञात+अङ्घ्रि+गतिः तन्वी राज्ञी कण्टक+उपलैः त्रस्ता अभूत्।४१।

पण त्या राणीला त्या विषाची बाधा झाली तरी तिचा मृत्यू झाला नाही. तिच्या सुदैवाने तिने मुलाला जन्म दिला. त्या मुलालाही ते विष बाधले. त्यामुळे दोघांनाही सर्वांगावर व्रण झाले.३७. त्यांच्या त्या रोगावर अनेक उपाय करूनही तो शमला नाही. दोघेही सारखे दुःखाने आक्रोश करायचे. त्यांना न धड आहार ना धड झोप मिळत होती. त्या कष्टांनी ते अगदी क्षीण होऊन गेले.३८. एकदा त्यांची ती अवस्था पाहून आणि त्यांच्या पू आणि दुर्गंधाला विटून राजाने आपल्या सारथ्याला त्यांना तत्काळ अरण्यात सोडून यायची आज्ञा केली.३९. त्याप्रमाणे त्या सारथ्यानेही त्याना रथात घालून दूर निबिड अरण्यात सोडून दिले आणि तसे राजाला येऊन सांगितले. त्या दुष्ट राजाला खूप आनंद झाला आणि तो दुसऱ्या अनभिषिक्त राणीबरोबर रममाण झाला.४०. त्या हिंस्र पशूंनी व्याप्त अशा निर्जन अरण्यात ती अंगावरच्या व्रणांनी पीडलेली, आपली पाउले कुठे पडताहेत याचीही शुद्ध नसलेली रूपवती राणी खड्या-काट्यांनी ठेचकाळत होती. हातात लेकरू घेऊन ती आपल्या दैवालाच बोल लावू लागली.४१.

**धृतार्भा प्राह हा दैव कष्टमीदृक् प्रदर्शितम् । सार्भा खादय हिंस्रैर्मां दुःखबन्धाद्विमोचय ।।४२।।**
**एवं सा विलपन्ती गाः प्रेक्ष्याग्रे मन्दगामिनी । आगत्य प्राह गोपान्भो तृषोत्क्रामन्ति मेऽसवः ।।४३।।**
**तामूचुस्तेऽम्बिवहास्त्यारान् मन्दं सृत्यानया व्रज । सापि गत्वाम्बु पीत्वोचे सरस्तीरस्थ योषितः ।।४४।।**
**कोऽत्र राजा प्रजा हृष्टा भान्ति मे ब्रूत योषितः । ता ऊचुस्त्वत्र राड्वैश्यः साधुः पद्माकरः कृती ।।४५।।**

धृत+अर्भा प्राह, 'हा दैव! ईदृक् कष्टं प्रदर्शितम्। मां स+अर्भा हिंस्रैः खादय। दुःख+बन्धात् विमोचय।'४२। एवं विलपन्ती सा अग्रे गाः प्रेक्ष्य मन्द+गामिनी आगत्य गोपान् प्राह, 'भो, तृषा मे असवः उत्क्रामन्ति।'४३। ते तां ऊचुः, 'इह आरात् अम्बु अस्ति। अनया सृत्या मंदं व्रज।' सा अपि सरः गत्वा अम्बु पीत्वा तीरस्थ योषितः ऊचे।४४। 'योषितः, अत्र कः राजा मे ब्रूत। प्रजा हृष्टा भान्ति।' ता ऊचुः, 'अत्र तु वैश्यः साधुः कृती पद्माकरः राट्।'४५।

'हाय रे दैवा, कसला हा कष्टप्रद वनवास मला दाखवीत आहेस? एखाद्या हिंस्र प्राण्याच्या तोंडून मला माझ्या बाळासकट खाववीत का नाहीस? या दुःखाच्या जोखडांतून मी सुटेन तरी!' अर्थात् वाघसिंहाविषयीच्या औदार्याने ती बोलत नाही तर आपल्या असह्य शारीरिक वेदनांना कंटाळून बोलते आहे. 'मी सर्वदा असावे. माझे अस्तित्व नाही असे कधीही होऊ नये,' हे आत्म्याचे सच्चिदानंदरूपत्व सर्व प्रणिमात्र अनुभवतात. शारीरिक कष्टांना त्रासून दुःखावेशाने निघालेले हे उद्गार आहेत. पुढचे तिचे बोलणे, 'एकदाची मी या दुःखांतून सुटेन तरी!' हेच दर्शवितात.४२. असा शोक करीत करीत ती जात असताना तिला पुढे कांही गाई चरताना दिसल्या. तेव्हा हळूहळू त्या गुराख्यांकडे जाऊन म्हणाली, 'तहानेने माझे प्राण कासावीस झालेत!'४३. ते गुराखी तिला म्हणाले, 'इथे जवळच पाणी आहे. या वाटेने हळूहळू जा.' तेव्हा ती राणी त्या तळ्याकडे गेली आणि पाणी पिऊन तिथे असलेल्या स्त्रियांना म्हणाली, 'बायांनो, इथे कोण बरे राजा राज्य करतो? इथली प्रजा मला आनंदी दिसते.'४४. त्या उत्तरल्या, 'इथे पद्माकर नावाचा एक धर्मशील आणि पुण्यावान् वैश्य राजा आहे.'४५.

**अत्रान्तरेऽपि तद्दास्यः प्राप्तास्ताभिः सहाययौ । राज्ञी विट्पं पुरे दीना स तां पप्रच्छ विस्तरात् ।।४६।।**
**सा शशंसादितः सर्वं दयालुस्तां ररक्ष सः । ततः सुतोऽल्पकालेन व्रणत्रस्तोऽभ्यगान्मृतिम् ।।४७।।**
**विलपन्ती तदा तन्वी प्रेतमज्ञानतोऽब्रवीत् । त्यक्त्वा शोकार्णवे दीनां मातरं मां क्व गच्छसि ।।४८।।**
**त्वत्कृतेऽदो मया भुक्तं कष्टं तन्न स्मरस्यहो । त्वदर्थेऽन्तरिता भर्तृ-पितृमातृहितस्वकाः ।।४९।।**
**त्वदर्थं विस्मृतं दुःखं मया राट्त्यक्तयापि मे । जीवोऽसि त्वयि यातेऽहं मरिष्ये नात्र संशयः ।।५०।।**

अत्र+अन्तरे तत्+दास्यः अपि प्राप्ताः। दीना राज्ञी ताभिः सह पुरे विट्+पं आययौ। सः तां विस्तरात् पप्रच्छ।४६। सा आदितः सर्वं शशंस। सः दयालुः तां ररक्ष। ततः अल्प+कालेन व्रण+त्रस्तः सुतः मृतिं अभ्यगात्।४७। तदा विलपन्ती तन्वी अज्ञानतः प्रेतं अब्रवीत्। 'मां दीनां मातरं शोक+अर्णवे त्यक्त्वा क्व गच्छसि?४८। अहो! मया त्वत्+कृते अदः कष्टं भुक्तं तत् न स्मरसि? त्वत्+अर्थे भर्तृ+पितृ+मातृ+हित+स्वकाः अन्तरिताः। त्वत्+अर्थं राट्+त्यक्तया मया मे दुःखं अपि विस्मृतम्। जीवः असि! त्वयि याते अहं मरिष्ये अत्र न संशयः।५०।'

कांही वेळाने त्या राजाच्या दासीच तिथे आल्या. ती दीनवाणी राणी त्यांच्याबरोबरच नगरात राजाकडे आली. त्याने तिला तिची हकीकत सविस्तर विचारली.४६. तिनेही सुरुवातीपासून आपल्यावर कोसळलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. त्या दयाळू राजाने तिला आश्रय दिला. पुढे थोड्याच दिवसानी तिचा तो व्रणग्रस्त मुलगा मृत्यू पावला.४७. तेव्हा ती सुंदरी विलाप करू लागली आणि स्त्रीसुलभ मोहाने अज्ञानवश त्या प्रेतालाच बोलू लागली. 'बाळा रे, ह्या तुझ्या अनाथ आईला शोकसागरात लोटून तू कुठे जातोस?४८. तुझ्यानिमित्त मी किती कष्ट भोगले त्याची तुला कांहीच आठवण नाही का? तुझ्यामुळेच माझ्या सवतीने मला विष दिले. तुझ्याचसाठी माझी माझ्या पती, पिता, माता, मित्र आणि स्वजन यांच्यापासून ताटातूट झाली.४९. अरे बाळा, तुझ्याकडे पाहूनच मी राजाने मला टाकल्याचे दुःखही पिऊन टाकले. तू माझा प्राणच आहेस! तूच जर सोडून गेलास तरी मीही मरूनच जाणार, यात काय संशय?'५०.

**इति तद्रुदितं श्रुत्वागच्छन्हि ऋषभो मुनिः । विट्पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप करुणार्द्रधीः ।।५१।।**
**कुतो रोदिषि राज्ञीदं जगन्मायामयं ह्यसत् । भौतिके नश्वरे देहे कुतः पुत्रादिकल्पना ।।५२।।**
**कीटः कण्टकधाम्नेव यावदायुर्विचेष्टते । जीवः कर्मौघरचित-धाम्नारब्धाशनोऽवशः ।।५३।।**
**कालकर्मगुणोत्पन्नो नायं सम्बन्धलिङ्गभाक् । चिदंशः सर्वगो नित्यो देहस्त्वाद्यन्तवानचित् ।।५४।।**

इति तत्+रुदितं श्रुत्वा आगच्छन् हि करुणा+आर्द्र+धीः ऋषभः मुनिः विट्+पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप।५१। '(हे) राज्ञि कुतः रोदिषि? इदं माया+मयं जगत् असत् हि। भौतिके नश्वरे देहे पुत्र+आदि+कल्पना कुतः?'५२। 'जीवः कण्टक+धाम्ना कीटः इव यावत् आयुः कर्म+ओघ+रचित+ धाम्ना आरब्ध+अशनः अवशः विचेष्टते।'५३। 'काल+कर्म+गुण+उत्पन्नः अयं न सम्बन्ध+लिङ्ग+भाक्। चित्+अंशः सर्वगः नित्यः। देहः तु आदि+अन्त+वान् अचित्।५४।

तिचा तो विलाप ऐकून ऋषभ मुनी तिथे आले आणि त्या वैश्य राजाला भेटून त्यांनी तिची चौकशी केली. मग ते करुणासागर मुनी तिच्याकडे आले.५१. त्यांना तिच्या शोकाचे कारण कळाले असल्याने आणि हा मृत बालक आपला पूर्वजन्मीचा सेवकच आहे हे जाणून त्यांनी तिला उपदेश करायला आरंभ केला. 'राणीसाहेब, आपण का बरे रडत आहात? हे पुत्र इत्यादि जग खरे असते तर शोकाचे कारण होते. पण हे तर मायेपासून झालेले स्वप्नासारखे आभासिक आहे.' हे प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असताना भास कसा म्हणावा? त्याचे उत्तर दिले आहे, 'ह्या पांचभौतिक नश्वर देहावर पुत्र इत्यादि कल्पना कशी करतेस?'५२. (प्रश्न) 'पण ह्या भौतिक देहाच्या आश्रयानेच जन्मापसून श्मशानापर्यंत सर्व व्यवहार होतातच ना? मग पुत्रादि संबंध होतोच की!' (उत्तर) जसा एखादा किडा आपल्या शरीरावर काटेरी कोष करतो आणि त्यात विविध चेष्टा करतो तसाच जीव आपल्या पूर्वार्जित कर्मापासून झालेल्या देहाने आपल्या प्रारब्धाचा विवशतेने भोग घेतो. तो देहाहून वेगळाच असतो.५३. 'त्या जीवाचे निमित्त कारण कर्म आहे, सत्त्व, रज, तम हे गुण त्याचे उपादान कारण आहेत आणि कर्म पिकण्यासाठी आवश्यक काल हा क्षोभक आहे. त्या जीवाला न पुत्रादि..

**कोऽपि शुग्विषयो नातो धृतिमास्थाय सात्त्विकीम् । भज प्रारब्धमश्नन्ती यावदायुः परेश्वरम् ।।५५।।**
**एतावदृषभः प्रोक्त्वा विरराम तदा तु सा । अबोधविक्लवा प्राह प्रणताश्रूत्तलोचना ।।५६।।**
**भवताऽध्यात्मतत्त्वं मे प्रोक्तं कारुणिकेन सत् । सदा परिचितोऽबोधः स्थेयं नैतेन तन्मयि ।।५७।।**

कः अपि शुक्+विषयः न। अतः सात्त्विकीं धृतिं आस्थाय यावत् आयुः प्रारब्धं अश्नंन्ती पर+ईश्वरं भज।५५।' ऋषभः एतावत् प्रोक्त्वा विरराम। तदा सा तु अबोध+विक्लवा प्रणता अश्रु+उत्त+लोचना प्राह।५६। 'कारुणिकेन भवता मे अध्यात्म+तत्त्वं सत् प्रोक्तम्। अबोधः सदा परिचितः, एतेन तत् मयि न स्थेयम्।'५७।

..संबंध आहेत न स्त्रीपुरुषलिंग आहे. तो चैतन्याचा अंश असल्याने सर्वव्यापी आहे. अशा ह्या नित्य शाश्वत जीवाला अंतच नाही. मग त्याचा शोक का म्हणून करायचा? देह तर बोलूनचालून आदि आणि अंत असलेली जड वस्तू आहे. तिचाही शोक करणे व्यर्थ आहे.'५४. 'याप्रमाणे, हे राणी, शोकाचे कांही कारणच नाही. तरी सात्त्विक धैर्याचा अवलंब करून जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत प्रारब्ध भोगीत परमेश्वराची भक्ती कर!'५५.

ऋषभदेव एवढे बोलून थांबले. तेव्हा अज्ञानाने बधीर झालेली राणी, मुनींपुढे नम्र होऊन पाणावलेल्या डोळ्यांनी म्हणाली, 'आपण मोठ्या कळवळ्याने मला हे समीचीन दुर्लभ अध्यात्मज्ञान सांगितले खरे! पण सतत अज्ञानाच्याच छायेत असणाऱ्या माझ्या मनात ते स्थिरावत नाही.' कठोपनिषदांत (१:२:७) म्हटलेच आहे, 'अनेकांना ते (आत्मतत्त्व) ऐकूनही कळत नाही.'५७.

**येन मे सुप्रसन्नं स्यान् मनस्तद्धि विधीयताम् । ईशेन प्रेरितो दुःख-दशायामपि मे भवान् ।।५८।।**
**स तच्छ्रुत्वा सकारुण्यं बालं ज्ञात्वा स्वसेवकम् । प्रसन्नोऽभूत्स नत्यैव फलन्त्यत्र हि साधवः ।।५९।।**
**तपउज्वलितात्मा स साक्षाच्छम्भुरिवापरः । चिक्षेप भस्म तद्गात्रे स सुप्तोत्थितवत्स्थितः ।।६०।।**
**दत्वासिं शैवकवचं नागायुतबलं मुनिः । भूयादजेयो भद्रायू राजशास्तेत्युवाच सः ।।६१।।**

'येन मे मनः सुप्रसन्नं स्यात् तत् हि (भवता) विधीयताम्। मे दुःख+दशायां अपि भवान् ईश्वरेण प्रेरितः।'५८। सः तत् स+कारुण्यं श्रुत्वा बालं स्व+सेवकं ज्ञात्वा सः प्रसन्नः अभूत्। अत्र साधवः नत्या एव हि फलन्ति।५९। तप+उज्वलित+आत्मा साक्षात् अपरः शम्भुः इव तत्+गात्रे भस्म चिक्षेप। सः सुप्त+उत्थितवत् स्थितः।६०। मुनिः असिं शैव+कवचं (तथा) नाग+अयुत+बलं दत्वा सः उवाच, 'अजेयः भद्र+आयुः राज+शास्ता भूयात्' इति उवाच।६१।

'ज्यायोगे माझे मन सुप्रसन्न होईल असेच आपण करावे. मन प्रसन्न झाले की सर्व दुःखांचा नाश होतो (भ.गीता २:६५) माझ्या ह्या दुःखावस्थेत आपल्याला ईश्वरानेच पाठविले आहे!'५८. ते ऋषभदेव तिचे ते काकुळतीचे बोलणे ऐकून आणि तो बालक आपला सेवक आहे हे जाणून प्रसन्न झाले. खरोखर या भूतलावर साधू केवळ प्रणामानेच फलदायी होतात. (अर्थांतरन्यास) आश्वलायन गृह्यसूत्रानुसार (१:१:५) 'देवता नमस्काराचे उल्लंघन करीत नाहीत.'५९. तपाने अंतर्बाह्य तेजस्वी असे ते साक्षात् शंकरच जणू होते. त्यांनी त्या बालकाच्या शरीराच्या सर्व भागांवर भस्म प्रोक्षण केले. त्याबरोबर तो बालक झोपेतून जागल्यासारखा उठून बसला.६०.

ऋषभ मुनींनी त्याला खड्ग, शैव कवच आणि दहा हजार हत्तींचे बळ दिले आणि 'तूं अजिंक्य, दीर्घायुषी आणि राजाला शासन करणारा होशील' असा आशीर्वाद दिला. इथे श्रीस्वामिमहाराजांनी स्कंद पुराणांतील (ब्रह्मोत्तर खंड १२:३५:४२) पुढील श्लोक उद्धृत केले आहेत. '*पुनश्च भस्म संमंत्र्य तदङ्गं परितोऽस्पृशत्। खड्गशङ्खाविमौ दिव्यौ परसैन्यविनाशिनौ।। आत्मसैन्यस्वपक्षाणां शौर्यतेजविवर्धनौ। एतयोश्च प्रसादेन शैवेन कवचेन च।। द्विषट्सहस्रनागानां बलेन महतापि च। भस्मधारणसामर्थ्याच्छत्रुसैन्यं विजेष्यति।। प्राप्य सिंहासनं पित्र्यं गोप्ताऽस्ति पृथिवीमिमाम्।।*'६१.

**तदा माता सुतोऽपि द्राग् दिव्यगात्रौ बभूवतुः । एतावान् साधुमहिमा तस्मात्तं शरणं व्रज ।।६२।।**

**।। राजोवाच ।।**

**साधु श्राव्यं त्वया प्रोक्तं सन्माहात्म्यं द्विजोत्तम । क्वास्त एतादृशः साधुस्तन्मे कथय भूसुर ।।६३।।**
**म्लेच्छोऽयं कथमस्मै तत्कथनीयमिति प्रिय । न मन्तव्यं हि दासोऽहं ब्राह्मणानां विशुद्धधीः ।।६४।।**

**।। विप्र उवाच ।।**

**मया तु भीमामरजा-सङ्गमे कश्चनास्ति सन् । साक्षात् परेश्वर इव श्रुतस्तं शरणं व्रज ।।६५।।**

'तदा माता, सुतः अपि दिव्य+गात्रौ बभूवतुः। एतावान् साधु+महिमा! तस्मात् तं शरणां व्रज।'६२। राजा उवाच। '(हे) द्विज+उत्तम, त्वया श्राव्यं सत्+माहात्म्यं साधु प्रोक्तम्। (हे) भू+सुर, एतादृशः साधुः क्व आस्ते, मे कथय।'६३। '(हे) प्रिय, अयं म्लेच्छः अस्मै कथं कथनीयं इति न मन्तव्यम्। अहं विशुद्ध+धीः, ब्राह्मणानां दासः।'६४। विप्र उवाच। 'मया तु श्रुतं, भीमा+अमरजा+सङ्गमे कश्चन पर+ईश्वर इव अस्ति। तं शरणं व्रज।'६५।

तेव्हा लगेच त्या मायलेकांची शरीरे व्रणरहित आणि दिव्य झाली. 'राजेसाहेब, असा हा संतांचा महिमा आहे. तेव्हा तुम्ही त्यांना शरण जा.'६२. राजाने विचारले, 'ब्रह्मश्री, आपण हे श्रवणीय असे साधूंचे माहात्म्य छान सांगितलेत. असा संतश्रेष्ठ मला कुठे भेटेल ते मला सांगा.'६३. 'हा मुसलमान आहे, ह्याला कसे सांगावे?' असा विचार कृपया मनात आणू नका. मी शुद्ध बुद्धीने विचारीत आहे आणि मी ब्राह्मणांचा सेवक आहे!'. त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'भीमा-अमरजा संगमावर असा कुणी एक परमेश्वरस्वरूप महात्मा आहे, असे माझ्या ऐकण्यात आले आहे. तुम्ही त्यांना शरण जा!'६५.

**तच्छ्रुत्वा सत्वरं राज्यमेत्य राजा बलान्वितः । प्रतस्थे स्वासनारूढः साधुसंदर्शनाय सः ।।६६।।**
**गन्धर्वपुरमासाद्य पौरान् पप्रच्छ कश्चन । आस्तेऽत्र तापसस्तं मे भवन्तो दर्शयन्त्वरम् ।।६७।।**
**म्लेच्छान्दृष्ट्वापि ते भीता नोचुः क्रुद्धोऽब्रवीन्नृपः । तद्दर्शनायागतोऽस्मि कुत्रास्ते स तु कथ्यताम् ।।६८।।**
**तदोचुः सङ्गमेऽस्तीति तच्छ्रुत्वा सत्वरं नृपः । पादचारी नदीं गत्वा ददर्श श्रीगुरुं परम् ।।६९।।**
**तमपि प्रेक्ष्य भगवान् प्राह रे रजकानुग । कुत्र तिष्ठसि कच्चित्त्वं क्षेमी नेहागतः कुतः ।।७०।।**

तत् श्रुत्वा सः राजा सत्वरं राज्यं एत्य बलान्वितः स्वासन+आरूढः साधु+संदर्शनाय प्रतस्थे।६६। गन्धर्वपुरं आसाद्य पौरान् पप्रच्छ, 'अत्र कश्चन तापसः आस्ते। भवन्तः तं मे अरं दर्शयन्तु।'६७। ते म्लेच्छान् दृष्ट्वा भीताः न ऊचुः। नृपः क्रुद्धः अब्रवीत्। 'तत्+दर्शनाय आगतः अस्मि। सः तु कुत्र आस्ते कथ्यताम्।'६८। तदा (ते) ऊचुः, 'सङ्गमे अस्ति' इति। तत् श्रुत्वा नृपः सत्वरं पादचारी गत्वा परं गुरुं ददर्श।६९। भगवान् अपि तं प्रेक्ष्य प्राह, 'रे रजक, अनुग, कुत्र तिष्ठसि? कच्चित् त्वं क्षेमी? कुतः इह न आगतः?'७०।

त्या ब्राह्मणाच्या सांगण्यानुसार तो राजा लगेच घाईने बिदरला आला आणि आपल्या पालखीत बसून सैन्यासह संतदर्शनासाठी गाणगापूरला निघाला.६६. तिथे येऊन त्याने तिथल्या लोकांना विचारले, 'इथे कुणी तपस्वी महात्मे राहतात; ते कुठे आहेत ते मला लवकर दाखवा!'६७. नगरवासी त्या सगळ्या मुसलमानांना पाहून घाबरून कांहीच बोलेनात. त्यावर राजा चिडून म्हणाला, 'अहो, मी त्यांच्या दर्शनासाठी आलो आहे. ते कुठे आहेत ते सांगा ना!'६८. मग त्यांनी त्याला सांगितले की 'स्वामी संगमावर आहेत.' ते ऐकताच राजा पालखीतून उतरला आणि लगबगीने पायीच चालत नदीवर जाऊन त्याने त्या परमश्रेष्ठ श्रीगुरूंचे दर्शन घेतले.६९. त्याला पाहताच श्रीगुरू म्हणाले, 'अरे माझ्या भक्ता रजका, कुठे असतोस? तू सकुशल आहेस ना? इतके दिवस का आला नाहीस? मला सांग!'७०.

**तच्छ्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्धप्राक्स्मृतिरब्रवीत् । त्वद्दत्तराज्यसक्तेन तवाङ्घ्री विस्मृतौ मया ।।७१।।**
**योऽहं प्राग्रजकः सार्व-भौमः सोऽभवमीदृशी । त्वत्कृपा सत्यसङ्कल्प मम मन्तून् क्षमस्व भोः ।।७२।।**
**श्रीपाद रजकं कृष्णा-विहारे पाहि मानुगम् । लोलन्मस्तकबाह्वङ्घ्रि गलद्धर्षाश्रुमानतम् ।।७३।।**
**स्फोटकार्तिनिमित्तेन लब्धं ते दर्शनं हरे । अन्तर्गतापि संविन्मे लब्धैतर्हि निमेषतः ।।७४।।**

तत् श्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्ध+प्राक्+स्मृतिः अब्रवीत्। 'मया त्वत्+दत्त+राज्य+सक्तेन तव अङ्घ्री विस्मृतौ।'७१। '(हे) सत्य+सङ्कल्प, यः अहं प्राक् रजकः सः सार्वभौमः अभवम् ! ईदृशी त्वत्+कृपा। भोः मम मन्तून् क्षमस्व।'७२। '(हे) कृष्णा+विहारे श्रीपाद, लोलन्+मस्तक+बाहु+अङ्घ्रि गलत्+हर्षाश्रुं, आनतम् मां अनुगं पाहि।'७३। '(हे) हरे, स्फोटक+आर्ति+निमित्तेन ते दर्शनं लब्धम्। मे संवित् अन्तः+गता अपि एतर्हि निमेषतः लब्धा।'७४।

श्रीगुरूंचे वचन कानांवर पडताच राजाची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि हेच आपले गुरू श्रीपाद आहेत हे जाणून तो म्हणाला,(७१) 'आपणच दिलेल्या राज्यात आसक्त होऊन मी आपले चरण विसरून की हो गेलो!' 'असं का? मग सांग बरे मी कोण आहे?' असा श्रीगुरूंचा प्रश्न अपेक्षून तो राजा पुढच्या तीन श्लोकांत सांगतो आहे.(७२) 'प्रभो, आपले वचन कधीच मिथ्या होत नाही! पूर्वजन्मी मी जो परीट होतो तोच आता हा सार्वभौम राजा झालो आहे. असा आपला कृपाप्रभाव आहे! महाराज, माझ्या अपराधांची क्षमा करा.'७२. 'कृष्णातीरी रमणाऱ्या श्रीपादगुरो, हात, पाय आणि मस्तक थरथरत असताना, डोळ्यांतून हर्षाश्रू गाळीत आपल्यासमोर वाकलेल्या आपल्या सेवकाचे रक्षण करा!' सर्वांगाचा कंप आणि सात्त्विक भावांचा उद्रेक यातून राजावर शक्तिपात झाल्याचे संकेत मिळतात.७३. 'हरे, या स्फोटकाच्या दुखण्याच्या निमित्ताने आज आपले दर्शन झाले आणि माझी हरवलेली जाणीवही आत्ता एका क्षणात परतली!'७४.

**स्फोटकं दर्शय क्वास्त इत्युक्तो गुरुणा स तु । सन्तं स्फोटकमप्यङ्के न दृष्ट्वा चकितोऽब्रवीत् ।।७५।।**
**स्वामिन्मन्येऽनुगोऽयं ते स्फोटकोऽनयवर्तिनम् । आनीय दण्ड्यमन्यत्र कृतकार्यो ययौ खलु ।।७६।।**
**तव जाग्रत्सु वाक्येषु दुःखदोषपरिप्लुते । असारे सति संसारे मग्नं माज्ञं समुद्धर ।।७७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**तृप्तं तेऽपि मनो भोगैर् भुक्तं राज्यमपीप्सितम् । लब्धाः पुत्रादयो वापि का वापेक्षास्ति ते वद ।।७८।।**

गुरुणा, 'स्फोटकं क्व अस्ति, दर्शय!' इति उक्तः सः तु अङ्के सन्तं स्फोटकं अपि न दृष्ट्वा चकितः अब्रवीत्।७५। '(हे) स्वामिन्, अयं स्फोटकः ते अनुगः मन्ये। अनय+वर्तिनं दण्ड्यं (मां) आनीय कृत+कार्यः अन्यत्र ययौ खलु।७७। तव जाग्रत्सु वाक्येषु दुःख+दोष+परिप्लुते असारे संसारे मग्नं मां अज्ञं समुद्धर।'७७। श्रीगुरुः उवाच। 'ते मनं भोगैः तृप्तम्? अभीप्सितं राज्यं अपि भुक्तम्? पुत्र+आदयः अपि लब्धाः वा? का वा अपेक्षा अस्ति? वद।'७८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुला स्फोटक झाला आहे का? दाखव पाहू कुठे आहे?' तेव्हा राजाने पाहिले मांडीवर असलेला तो फोड नाहीसाच झाला आहे! तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.७५. 'स्वामिमहाराज, हा स्फोटक तुमचाच दूत असावा. अन्यायाने वागणाऱ्या, शिक्षापात्र अशा मला इथे आणून, आपले काम होताच इतरत्र निघून गेला वाटते!'७६. 'महाराज, पूर्वजन्मी आपल्या जाग्रत वचनांचा उपदेश असूनही मी या दुःखदोषांनी बरबटलेल्या सारहीन संसारात निमग्न झालो आहे. आपणच माझा यातून उद्धार करा.'७७. श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुझे मन भोगांनी तृप्त झाले का? तुला ज्याची तीव्र कामना होती ते राज्य भोगून झाले ना? पुत्रादि सर्व लाभले ना? का आणखी कांही अपेक्षा आहे, मला सांग.'७८.

**स प्राह परिपूर्णं मे सर्वं ते कृपयेश्वर । त्वद्दत्ताप्यखिला ते श्रीरर्पणीयेत्यपेक्षितम् ।।७९।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यतेर्मे गमनं म्लेच्छ गोघ्ने राज्ये कथं भवेत् । मां वर्णास्त्वामपि म्लेच्छ हसिष्यन्ति न संशयः ।।८०।।**

**।। राजोवाच ।।**

**रजकोऽहं भवान्छ्रीपान् न हिंसातःपरं पुरे । इत्युक्त्वा लोलदङ्गस्तं नेतुकामोऽस्तुवद्विभुम् ।।८१।।**

सः प्राह, '(हे) ईश्वर, ते कृपया मे सर्वं परिपूर्णम्। त्वत्+दत्ता अखिला श्रीः अर्पणीया इति अपेक्षितम्।'७९। श्रीगुरुः उवाच। 'रे म्लेच्छ, मे यतेः गो+घ्ने राज्ये गमनं कथं भवेत्? मां वर्णाः त्वां अपि म्लेच्छाः हसिष्यन्ति न संशयः।'८०। राजा उवाच। 'अहं रजकः, भवान् श्रीपादः। अतःपरं पुरे हिंसा न।' इति उक्त्वा लोलत्+अङ्गः तं नेतु+कामः विभुं अस्तुवत्।८१।

तो यवन राजा उत्तरला, 'महाराज, आपल्या कृपेने माझे सर्व कांही परिपूर्ण झाले आहे. आता आपण दिलेले हे सर्व ऐश्वर्य आपल्याला समर्पित करावे हीच एक इच्छा आहे!'७९. श्रीगुरू म्हणाले, 'अरे यवना, माझ्यासारख्या संन्याशाला, जिथे नित्य गोहत्या होते त्या राज्यात कसे बरे जाता येईल? मला वर्णाश्रमधर्माचे लोक (हिंदू), आणि तुलाही सगळे मुसलमान निःसंशय हसतील की!' इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी '**गो** म्हणजे वेदांची विधिवचने (आज्ञा) यांची हत्या म्हणजे नास्तिक्याने अवज्ञा होते अशा तुझ्या राज्यात मी संन्यासी कसा येऊ?' असा पर्यायी अर्थ दिला आहे.८०. राजा म्हणाला, 'मी जरी सांप्रत जातीने मुसलमान असलो तरी पूर्वजन्माची स्मृती आल्याने आपण श्रीपादस्वामी आहात आणि मी आपला सेवक रजक आहे. याउप्पर माझ्या नगरीत गोहिंसा होणार नाही.' असे बोलून कापऱ्या शरीराने श्रीप्रभूंना आपल्या राज्याला नेण्याच्या इच्छेने तो त्यांची स्तुती करू लागला.८१.

**स प्राह तुष्ट आयास्ये भक्ताधीनोऽस्मि केवलम् । हेतुनानेन नोपेक्ष्या मद्भक्ता मद्गतान्तराः ॥८२॥**
**स तच्छ्रुत्वोपवेश्येशं प्रतीतः स्वासने नृपः । वाहान्दत्वापि शिष्येभ्यो धृततत्पादुकोऽन्वगात् ॥८३॥**
**प्राहाङ्घ्रिचारिणं स्वामी तं तदारादितो नृप । गन्तव्यमस्त्यपीदं तु न श्लाघ्यं सार्वभौम ते ॥८४॥**
**स प्राह सार्वभौमः को रजकस्तेऽनुगोऽस्म्यहम् । त्वयैव न्यस्तभूधूस्त आज्ञयानुचराम्यहम् ॥८५॥**

तुष्टः सः प्राह, 'आयास्ये। केवलं भक्त+अधीनः अस्मि। अनेन हेतुना मत्+गत+अन्तराः मत्+भक्ताः न उपेक्ष्याः।'८२। सः प्रतीतः नृपः तत् श्रुत्वा ईशं स्व+आसने उपवेश्य, शिष्येभ्यः अपि वाहान् दत्वा धृत+तत्+पादुकः अन्वगात्।८३। तत् तं अङ्घ्रि+चारिणं स्वामी प्राह, 'इतः आरात् गन्तव्यं अस्ति। (हे) सार्वभौम, इदं अपि तु ते न श्लाघ्यम्।'८४। सः प्राह, 'कः सार्वभौमः? अहं ते अनुगः रजकः अस्मि। त्वया एव न्यस्त+भू+धूः अहं ते आज्ञया चरामि।'८५।

त्याने प्रसन्न होऊन श्रीपाद त्याला म्हणाले, 'बरे तर, येतो मी! मी केवळ भक्तपराधीन आहे. त्याकरिता ज्यांनी आपल्या चित्तांत मला धरून ठेवले आहे अशा माझ्या भक्तांची उपेक्षा करू नये.'८२. राजाला आनंद वाटला. त्याने लगेच श्रीगुरूंना आपल्या पालखीत बसविले, त्यांच्या शिष्यांनाही वाहने दिली आपण श्रीगुरूंच्या पादुका हातात घेऊन तो पायीच त्यांच्या मागे निघाला.८३. त्याला तसे पायी चालतांना पाहून स्वामी म्हणाले, 'आपल्याला इथून बरेच दूर जायचे आहे. तुझ्यासारख्या सार्वभौम राजाला हे असे पायी चालणे शोभत नाही.' ८४. तो राजा म्हणाला, 'कोण सार्वभौम राजा? महाराज! मी तर आपला दास रजक आहे. आपणच माझ्या खांद्यावर दिलेली हा राज्याची धुरा मी वाहतो आहे आणि आपल्याच आज्ञेत राहतो आहे.'८५.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**दत्तं ते दिक्पमात्राभी राट्त्वं तेनासि विष्णुवत् । राजन्ममाज्ञयैवाश्वमारुह्य व्रज मा वद ॥८६॥**
**ततः सोऽप्यारुरोहाश्वं तमाह भगवान्नृप । गत्यानया क्रियालोपो भवेदग्रे व्रजाम्यतः ॥८७॥**
**एहि मन्दं पापनाश-तीर्थे तिष्ठामि भूपते । इत्युक्त्वार्धक्षणात् पङ्क्ति-योजनायतमापतत् ॥८८॥**
**सशिष्यः स तु तत्तीर्थे सान्ध्यं कर्माकरोत्तदा । सायंदेवसुतो नाग-नाथो गच्छन् ददर्श तम् ॥८९॥**

श्रीगुरुः उवाच। '(हे) राजन्, ते दिक्+प+मात्राभिः राट्+त्वं दत्तम्। तेन (त्वं) विष्णु+वत् असि। मम आज्ञया एव अश्वं आरुह्य व्रज। मा वद।'८६। ततः सः अपि अश्वं आरुरोह। भगवान् तं आह, 'अनया गत्या क्रिया+लोपः भवेत्। अतः अग्रे व्रजामि।'८७। 'भूपते, मन्दं एहि। पापनाश+तीर्थे तिष्ठामि।' इति उक्त्वा अर्ध+क्षणात् पंक्ति+योजन+आयतं आपतत्।८८। तत् सः तु सशिष्यः सांध्यं कर्मं अकरोत्। तदा सायंदेव+सुतः नागनाथः गच्छन् तं ददर्श।८९।

**हीन यातीचा राजाही आदरणीय.** श्रीगुरु त्याला म्हणाले, 'अरे राजा, मी तुला दिक्पालांच्या अंशापासून राजेपण दिलेले आहे. त्यामुळे तू विष्णुसमान आहेस. तरी माझी आज्ञा म्हणूनच तू आता कांही न बोलता घोड्यावर स्वार हो.' ह्यातून असे सूचित केले आहे की युगमानाने जरी राजा हीन जातीचा असला तरी त्याचा आदर केला पाहिजे आणि त्याच्या शासनाचे अतिक्रमण करू नये.८६. मग तो राजाही घोड्यावर बसला. त्याला श्रीगुरू भगवान् म्हणाले, 'ह्या मंद गतीने गेल्यास माझ्या नित्यकर्माचा लोप होईल. त्यासाठी मी पुढे जातो.'८७. 'आणि राजा, तू सावकाश ये. मी पापनाशतीर्थावर थांबतो.' एवढे बोलून श्रीगुरू क्षणार्धांत दहा योजन (४० कोस किंवा १०० मैल) दूर बिदरजवळील पापनाश तीर्थाला पोचले (गाणगापूरहून बिदर ११० कि.मी. आहे).८८. तिथे श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांसह संध्याकाळचे कर्म केले. तेवढ्यात सायंदेवाचा वडील मुलगा नागनाथाने तिथे येऊन श्रीगुरूंचे दर्शन घेतले.८९.

**चकोरश्चन्द्रमिव तं दृष्ट्वा हृष्टः स्वदैवतम् । संप्रार्थ्य स्वगृहं नीत्वा भोजयामास सादरम् ।।९०।।**
**सशिष्यस्तद्गृहे भुक्त्वा तमाहैष्यति राडिह । स तु म्लेच्छो न साध्वेतत्तीर्थे स्थेयमतो द्विज ।।९१।।**
**इत्युक्त्वा स ययौ तीर्थं स राजाप्याययौ तदा । प्रतीतः पादचारी स निन्ये निजपुरं गुरुम् ।।९२।।**
**अलङ्कृतं शुभं नाना-रत्नतोरणमण्डितम् । पताकाध्वजसङ्कीर्णं पुरं भास्वत्सुशोभनम् ।।९३।।**
**गीतवाद्यजयध्वान-सङ्कुलं शिष्ययुग्गुरुः । नीराजितो रत्नदीपैः पालकस्थो विवेश सः ।।९४।।**

तं स्व+दैवतं चकोरः चन्द्रं इव दृष्ट्वा हृष्टः संप्रार्थ्य स्व+गृहं नीत्वा सादरं भोजयामास।९०। (श्रीगुरुः) सशिष्यः तत्+गृहे भुक्त्वा तं आह, 'राट् इह एष्यति। स तु म्लेच्छः। न एतत् साधु। अतः (हे) द्विज, तीर्थे स्थेयम्।'९१। इति उक्त्वा सः तीर्थं ययौ। तदा सः राजा अपि आययौ। सः प्रतीतः पादचारी गुरुं निज+पुरं निन्ये।९२। अलङ्कृतं शुभं नाना+रत्न+तोरण+मण्डितं पताका+ध्वज+सङ्कीर्णं सुशोभनं भास्वत् गीत+वाद्य+जय+ध्वान+सङ्कुल सः पालक+स्थः शिष्ययुक् गुरुः पुरं रत्न+दीपैः नीराजितं विवेश।९३-९४।

आपले दैवतच असलेल्या श्रीगुरूंना पाहून चकोराला चंद्रदर्शनाने व्हावा तसा आनंद त्याला झाला. या दृष्टांताने त्याला गुरुदर्शनाची किती ओढ होती ते दाखविले आहे. त्याने आग्रहाची प्रार्थना करून सर्वांना आपल्या घरी नेऊन आदरपूर्वक भोजन दिले.९०. शिष्यांसह नागनाथाच्या घरी भोजन घेतल्यावर श्रीगुरू त्याला म्हणाले, 'भटजी, आता थोड्याच वेळात राजा इथे येईल. तो तर तुला मुसलमान आहे. ते कांही बरे नाही. तरी आम्ही तीर्थावरच थांबतो.'९१. असे म्हणून ते तीर्थाला गेले. तितक्यात राजाही येऊन पोचला. श्रीगुरूंना पाहून त्याला आनंद झाला. स्वतः पायी चालत त्याने श्रीगुरूंना पालखीत बसवून आपल्या नगरीत नेले.९२. संपूर्ण शहर नाना रत्नांची तोरणे, पताका, ध्वज, यांनी शृंगारले होते. त्या सुशोभित, सुप्रकाशित आणि शुभालंकृत शहरात गीत, वाद्य आणि जयजयकारच्या गजरात, पालखीत बसून श्रीगुरूंनी शिष्यांसह प्रवेश केला. त्या वेळी त्यांना रत्नदीपांनी ओवाळण्यांत आले.९३-९४.

**पट्टकूलच्छत्रसृत्या नीत्वान्तःपुरमीश्वरम् । भद्रासने तूपवेश्य पूजयामास तं नृपः ।।९५।।**
**शिष्यान् यथास्वपीठस्थान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः । पुत्रान्पौत्रान्सखीन्स्वांश्च दर्शयामास शंभवे ।।९६।।**
**गीतं सवाद्यं नृत्यं च छत्रचामरमालिने । तस्मै समर्प्य प्रकृतीर् दर्शयामास सर्वशः ।।९७।।**
**म्लेच्छा विरुद्धचेष्टं धिक्-चक्रुर्भूपं द्विजार्चकम् । प्रशशंसुर्द्विजा राजा पुण्यश्लोकोऽयमित्यपि ।।९८।।**
**गुरुस्तमाह हृष्टोऽस्मि दृष्ट्वा ते प्रकृतीः शुभाः । तुष्टोऽस्याभिर्न वा ब्रूहि निःशङ्कं निकटं मम ।।९९।।**

पट्टकूल+छन्न+सृत्या अन्तःपुरं नीत्वा तु भद्र+आसने उपविश्य नृपः तं पूजयामास।९५। यथा+स्वपीठान् शिष्यान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः पुत्रान् पौत्रान् सखीन् स्वां च शंभवे दर्शयामास।९६। सवाद्यं गीतं नृत्यं च छत्र+चामर+मालिने तस्मै सर्वशः प्रकृतीः समर्प्य दर्शयामास।९७। म्लेच्छा विरुद्ध+चेष्टं द्विज+अर्चकं भूपं धिक् चक्रुः। द्विजाः 'अयं राजा पुण्य+श्लोकः' इति अपि प्रशशंसुः।९८। गुरुः तं आह, 'अस्याभिः तुष्टः असि? न वा? मम निकटं निःशंकं ब्रूहि।'९९।

राजाने त्यांना गालिच्यांनी मढवलेल्या मार्गाने अंतःपुरांत नेऊन सिंहासनावर बसवून राजोपचारांनी सत्कार केला.९५. शिष्यांनाही आपापल्या योग्यतेप्रमाणे आसने देऊन त्यांची उत्तम प्रकारे पूजा केली. मग राजाने आपल्या पट्टराण्या, इतर स्त्रिया, मुले, नातवंडे, मित्र, मैत्रिणी, स्वजन सर्वांना श्रीगुरूंना भेटविले.९६. श्रीगुरूंवर छत्र धरून व त्यांच्यावर चवऱ्या ढाळत त्यांना आपल्या सर्व मंत्री, सुहृद, कोश, सैन्य सन्माननीय पौर इत्यादि सर्व प्रकृती (वैभव) दाखविल्या. (*स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च। सेनाङ्गानि प्रकृतयः पौराणां श्रेणयोऽपि च।।* अमरकोश २:८:१७-१८).९७. त्या वेळी मुसलमान लोक ह्या ब्राह्मणांची पूजा करणाऱ्या धर्माविरुद्ध वागणाऱ्या राजाचा धिक्कार करू लागले. ब्राह्मण मात्र 'हा राजा पुण्यश्लोक आहे!' अशी त्याची भलाई करू लागले.९८.

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'या सगळ्या वैभवाने तू संतुष्ट आहेस ना? की नाहीस? मला निःशंकपणे सांग.'९९.

**स प्राहाभिर्न तुष्टोऽस्मि साम्राज्यं तेऽङ्घ्रिसंस्थितम् ।श्रुत्वा तत्परमं काङ्क्षे दुरापमपि देहि मे ।।१००।।**
**अद्यैव भवते कुर्वे सर्वस्वात्मनिवेदनम् । इत्युक्त्वा स तथा चक्रे राट् सङ्कल्पपुरःसरम् ।।१०१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कृतं साधु त्वया भूप तुष्टोऽनेन ददामि ते । मन्मनस्काय भक्ताय शुद्धभावाय काङ्क्षितम् ।।१०२।।**

सः प्राह, 'न तुष्टः अस्मि। ते अङ्घ्रि+संस्थितं साम्राज्यं श्रुत्वा तत् परमं काङ्क्षे। दुरापं अपि मे देहि।'१००। 'अद्य एव भवते सर्वस्व+आत्म+निवेदनं कुर्वे।' इति उक्त्वा राट् सङ्कल्प+पुरःसरं तथा चक्रे।१०१। श्रीगुरुः उवाच। '(हे) भूप, त्वया साधु कृतम्। अनेन तुष्टः मत्+मनस्काय भक्ताय शुद्ध+भावाय ते कांक्षितं ददामि।१०२।'

तेव्हा तो राजा उत्तरला, 'नाही महाराज! मी याने समाधानी नाही. आपल्या चरणसेवारूप साम्राज्याची मला आस आहे. कितीही दुष्प्राप्य असेल तरी ते मला द्या!'१००. 'सर्वस्वाचे आणि आपले समर्पण केल्यावाचून आपली चरणसेवा दुर्लभ असेल तर आजच मी माझे राज्यादि सर्वस्व आणि हा देह या सर्वांचे निवेदन करतो.' असे बोलून राजाने '*अनेन विश्वात्मा प्रसीदतु*' असा संकल्प करून मनःपूर्वक सर्वस्वात्मनिवेदन केले.१०१.

**भक्ताची जातपात पाहू नये.** श्रीगुरू म्हणाले, 'राजा, तूं हे मोठे सत्कार्य केलेस! ह्या आत्मसमर्पणाने माझ्या सर्वात्मकाच्या ठिकाणी तुझी वृत्ती अनन्य झाली आहे. आता तुला तुझी वांछित चरणसेवा देतो!' नीच यातीच्या मुसलमानाला कशी चरणसेवा दिली? या प्रश्नाचे उत्तर **'शुद्धभावाय भक्ताय'** या विशेषणात आहे. रागादि मल चित्तांतून गेल्याने त्या राजाचा (स्व)भाव शुद्ध झाला होता. '*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्*'।।९:३२।। या गीतावचनानुसार भगवंताच्या भक्तांसाठी वर्णादींचे प्रयोजन नाही. भक्तीच्या उत्पत्तीसाठी आपल्या वर्णाश्रमानुसार विहित कर्माचे अनुष्ठान करून चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. पण पूर्वजन्माच्या कांही संस्कारांनी जागलेल्या भक्तीचा कोणाला नाश करता येईल? तो राजा यवन असला तरी त्याच्या पूर्वसंस्कारांनी त्याच्या चित्तात भक्तीचा उदय झाला आहे. त्याच्या जातपातीमुळे तिला बाध येऊ शकत नाही. म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपली चरणसेवा दिली यावर कांहीही आक्षेप घेता येत नाही.१०२.

**इत्युक्त्वा श्रीगुरुर्यूने भूधुरं पार्थिवार्पिताम् । ज्येष्ठायादाद्विनीताय तदौरससुताय सः ।।१०३।।**
**भूपं प्राह गुरुः शीघ्रं प्रव्रजाहमितो द्रुतम् । गत्वा मठं समाश्वास्य शिष्यान्भक्तानपीतरान् ।।१०४।।**
**श्रीपर्वतं गमिष्यामि त्वमप्येहि नगोत्तमे । भवेन्मे दर्शनं तत्र जीवन्मुक्तो भविष्यसि ।।१०५।।**
**इत्युक्त्वा गौतमीं गत्वा स्नात्वा शिष्यान्वितः प्रभुः । संप्राप्तोऽमरजाभीमा-सङ्गमं योगिजीवनः ।।१०६।।**

इति उक्त्वा सः श्रीगुरुः पार्थिव+अर्पितं भूधुरं यूने, ज्येष्ठाय विनीताय तत्+औरस+सुताय अदात्।१०३। गुरुः भूपं प्राह, 'शीघ्रं प्रव्रज। अहं इतः द्रुतं मठं गत्वा, शिष्यान्, भक्तान् इतरान् अपि समाश्वास्य।१०४। श्रीपर्वतं गमिष्यामि। त्वं अपि नग+उत्तमे एहि। तत्र मे दर्शनं भवेत्। (त्वं) जीवन्+मुक्तः भविष्यसि।१०५।' इति उक्त्वा शिष्य+अन्वितः योगिजीवनः प्रभुः गौतमीं गत्वा स्नात्वा अमरजा+भीमा+सङ्गमं संप्राप्तः।१०६।

असे त्या राजाशी बोलून श्रीगुरूंनी त्याने अर्पण केलेली राज्यधुरा कामंदकाच्या वचनानुसार (*विनीतमौरसं पुत्रं यौवराज्येऽभिषेचयेत्।* २:६-७) त्याच्या तरुण, ज्येष्ठ, विनयशील औरस पुत्राला दिली.१०३. पुनः त्यांनी राजाला सांगितले, 'तू आता लवकर सगळी अहंता आणि ममता सोडून इथून - ह्या तुझ्या राज्यांतून, बाहेर पड. मीहि आता लगेच गाणगापुरच्या मठाला जाऊन तिथे सर्व शिष्याचे, भक्तांचे आणि इतरांचेही समाधान करून(१०४) श्रीशैल्याला जाणार आहे. तूही त्या पवित्र पर्वतावर ये. तिथे आपली भेट होईल आणि तू कृतार्थ होशील.'१०५.

याप्रमाणे त्या बादशहाशी बोलून शिष्यपरिवारासहित श्रीगुरूंनी गोदावरी नदीला जाऊन तिथे सिंहस्थ पर्वणीचे स्नान केले. आणि परत अमरजा-भीमा संगमावर आले.१०६. तेथील सर्व लोकांना आनंद झाला. त्यांनी श्रीगुरूंची पूजा करून त्यांच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मणभोजने केली.१०७.

**तत्रत्या अपि तं दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे तदा । नीराज्य श्रीगुरुं चक्रुस् तदर्थं ब्रह्मभोजनम् ॥१०७॥**
**सर्वत्र प्रसृता भक्तिर् म्लेच्छा अपि भजन्त्यतः । कलौ घोरेऽत्र न स्थेयं साक्षादेवेत्यमंस्त सः ॥१०८॥**
**श्रीशैलमुक्तवद्गत्वा म्लेच्छायापि स सद्गतिम् । सर्वस्वात्मार्पणाद्दत्वा पुनः प्रापाव्ययो मठम् ॥१०९॥**
**तस्थौ भजत्कामधेनुः प्रत्यक्षस्तत्र वै सताम् । अगोचरस्त्वनार्याणां जन्मान्धानामिवोष्णगुः ॥११०॥**

तत्रत्या सर्वे अपि तदा तं दृष्ट्वा जल्हादिरे। श्रीगुरुं नीराज्य तत्+अर्थं ब्रह्म+भोजनं चक्रुः।१०७। 'भक्तिः सर्वत्र प्रसृता, म्लेच्छा अपि भजन्ति। अतः अत्र घोरे कलौ साक्षात् न स्थेयम्।' इति सः अमंस्त।१०८। उक्त+वत् सः श्रीशैलं गत्वा म्लेच्छाय अपि सर्वस्व+अर्पणात् सत्+गतिं दत्वा पुनः अव्ययः मठं प्राप(१०९) तस्थौ। भजत्+काम+धेनुः तत्र सतां वै प्रत्यक्षः। अन+आर्याणां तु जन्म+अन्धानां उष्णगुः इव अगोचरः।११०।

'आपल्या भक्तीचा आता सगळीकडे प्रसार झाला आहे. त्यामुळे मुसलमानही आपल्याला भजतील. म्हणून या घोर कलियुगात आपण साक्षात् - दृश्यमान स्वरूपात, राहू नये' असा प्रभूंनी विचार केला.१०८. मग बादशहाला सांगितल्याप्रमाणे ते श्रीशैल्य पर्वताला गेले. त्या यवन राजाच्या सर्वस्वासहित आत्मसमर्पणाच्या फलस्वरूप त्याला उत्तम गती दिली आणि ते अविनाशी प्रभू मठात येऊन तिथेच राहिले. इथे **अपि** शब्दातून हे सुचविले आहे की इतरही भक्तांना ते सद्गती देतातच.१०९. भक्तांची कामधेनूच असलेले, नित्य भक्तांच्या कामना पुरविणारे श्रीगुरू आजही भक्तांना प्रत्यक्षच आहेत. अनार्यांना - नास्तिकांना, अभक्तांना, निंदकांना, तपहीनांना मात्र ते, जन्मांधाला जसा सूर्य, तसे अगोचर आहेत.११०.

**कृष्णापञ्चनदीयोगे प्रातः स्नात्वात्र सङ्गमे । कर्म कृत्वाह्निकं भिक्षां मठे भुक्त्वैव तिष्ठति ।।१११।।**
**दर्शिता विविधा लीला दर्शयत्यप्यनन्तशः । दर्शयिष्यति को वेत्ति प्रभावं तस्य दुर्ग्रहम् ।।११२।।**
**यो यो यस्य तु कामस्तद्भजनात्सिद्धिमेत्यरम् । भजतोऽनुभजत्येष यतोऽसौ भक्तिभावनः ।।११३।।**
**जागरूका कलौ प्रायः काचिन्न भगवत्कला । तत्साक्षाद्भगवन्तं तं श्रद्धयाऽसंशयं भज ।।११४।।**
**इति सिद्धोदितं श्रुत्वा श्रद्धयाऽसंशयं गुरुम् । अभ्यर्च्याऽऽपामृतं द्राक् तच्छ्रवणान्नामधारकः ।।११५।।**

(श्रीगुरुः) प्रातः कृष्णा+पञ्चनदी+योगे स्नात्वा सङ्गमे आह्निकं कर्म कृत्वा मठे भुक्त्वा (तत्र) एव तिष्ठति।१११। विविधा लीला दर्शिता, अनन्तशः दर्शयति, दर्शयिष्यति अपि। तस्य दुर्ग्रहं प्रभावं कः वेत्ति?११२। यः यः यस्य कामः तत्+भजनात् अरं सिद्धिं एति, यतः एष असौ भक्ति+भावनः भजतः अनुभजति।११३। 'कलौ प्रायः काचित् भगवत्+कला न जागरूका। तत् तं साक्षात् भगवन्तं श्रद्धया असंशयं भज।'११४। इति सिद्ध+उदितं श्रुत्वा नामधारकः गुरुं असंशयं अभ्यर्च्य तत्+श्रवणात् द्राक् अमृतं आप।११५।

आजही श्रीगुरू प्रातःकाळी नरसोबाच्या वाडीला कृष्णा-पंचगंगा संगमावर स्नान करून इथे भीमामरजा संगमावर आह्निक करून मठात भिक्षा (भोजन) करून तिथेच राहतात.१११. आजवर त्यांनी कित्येक लीला दाखविल्या आहेत, अगणित लीला आजही दाखवीत आहेत आहेत, भविष्यातही अशाच दाखविणार आहेत. त्यांचा अगम्य प्रभाव कुणी जाणला आहे?११२. इथे सेवा करणाऱ्यांच्या ज्या ज्या कामना असतील त्या त्या इथे तत्काल संपूर्ण होतात; कारण हे भक्तीला भाळणारे प्रभू भजणाऱ्यावर अनुग्रह करातात.११३. 'या कलियुगांत भगवंताच्या विभूतिरूप बहुतेक देवता निद्रित असतात; यासाठी या साक्षात् भगवंताची - श्रीगुरूंची, श्रद्धेने, सर्व संशय टाकून भक्ती कर.'११४. हे सिद्धमुनींचे वचन मानून नामधारकाने संशयरहित होऊन उपासना केली आणि त्या सद्गुरूंच्या गुणश्रवणाने तो लवकरच मोक्ष पावला.११५.

**तत्संवादमयं ग्रन्थं धर्म्यं गङ्गाधरात्मजः । सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत्तारकं सुधीः ।।११६।।**
**यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूत-रक्षोमुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः ।**
**सप्ताहं तत्पाठिने शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति ।।११७।।**
**स एवात्रेयगोत्रोत्थ-गणेशब्रह्मपुत्रगाम् । पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रन्थात्मा तारकोऽव्ययः ।।११८।।**

सुधीः गङ्गाधर+आत्मजः तत्+संवाद+मयं धर्म्यं तारकं सत् श्रीगुरुचरित्र+आख्यं ग्रंथं व्यरचत्।११६। एषः यत्र क्व अपि स्थापितः प्रेत+भूत+मुख्य+असत्+ग्रह+आर्तिघ्नः। सप्त+अहं तत् पाठिने शृण्वते अपि दत्तात्रेयः अभीष्ट कामान् ददाति।११७। सः एव अर्थ्यः तारकः अव्ययः ग्रन्थ+आत्मा आत्रेय+गोत्र+उत्थ+गणेश+पुत्र+गां पुनानः अत्र जयति।११८।

त्यांच्या - सिद्ध आणि नामधारक यांच्या, संवादरूप ओवीबद्ध श्रीगुरुचरित्र नावाचा धर्मप्रद ग्रंथ गंगाधरपुत्र सरस्वती यांनी मराठीत रचलेला आहे.११६. हा ग्रंथ जिथे कुठे केवळ ठेवलेलाही असला तरी भूत, प्रेत आदि दुष्ट ग्रहांची पीडा दूर होते. ह्या ग्रंथाचे सात दिवसांचे पठण अथवा श्रवण करणाऱ्याच्या अभीष्ट कामना श्रीदत्तप्रभू पूर्ण करतात.११७. तोच तारक, अविनाशी, पुरुषार्थप्रद ग्रंथस्वरूपी दत्तात्रेय आत्रेय गोत्रोत्पन्न ब्राह्मण गणेशाचा पुत्र वासुदेव याच्या वाणीला पावन करीत इथेही भक्तोद्धाररूपी विजय मिळवीत आहे.११८.

हा अंतिम श्लोक मंगलाचरणात्मक आहे. टीकेमध्ये श्रीस्वामिमहाराजांनी आपल्या अलौकिक प्रतिभेने याचे विविध प्रकारे विवरण केले आहे.

**१. ॐकारपर (ब्रह्मपर) -** कठ उपनिषदानुसार (१:२:१५-१७) 'सर्व वेदांनी प्रतिपादलेले, सर्व तपस्यांत पुरस्कारलेले, ज्याच्या प्राप्तीसाठी साधक ब्रह्मचर्य धारण करतात' अशा शब्दांत सर्व उपासकांसाठी सर्वश्रेष्ठ प्रतीक आणि आलंबन म्हणून **ॐ**काराचे प्रतिपादन केले आहे.

**ॐ नमो भगवन्विश्व-हेतो ब्रह्मेडिताज ते । मालीनो विश्वभृल्लीलाविहार्यस्यार्यभावनः ।।११९।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे पञ्चमोऽध्यायः । आदितस्त्रयोविंशोऽध्यायः ।।२३।।**

ॐ भगवन् विश्व+हेतो, ब्रह्म+ईडित, अज, ते नमः। मालीनः विश्वभृत् लीला+विहारी आर्य+भावनः असि।११९।

तसेच ते ब्रह्माचे नाम असल्याने आणि नाम आणि नामी यांचा अभेद लोकप्रसिद्ध असल्याने; वस्तुतः ॐकार हा ब्रह्माचाच विवर्त असल्याने ते आपल्या अधिष्ठानाहून वेगळे नाही; ते ब्रह्माचे नावच असल्याने '*ब्रह्मदृष्टिरुकर्षत्वात्*' या न्यायाने ब्रह्म म्हणून उपास्य आहे. **ॐ** आपल्या उपासकांचे अविद्यादि अनर्थबीजांपासून रक्षण करते. '*ॐ इति ब्रह्म*' (तैत्तिरीय उ. १:८:१) 'हेच एक अक्षर ब्रह्म' (कठ उ. ८:२:१६) 'हेच खरोखर पर तसेच अपर ब्रह्म आहे' (प्रश्न उ. ५:२) श्रुतिवचनांनुसार त्या ब्रह्माचे संबोधन 'हे **ॐ**'. **भगवन् -** वेदांच्या पठणात प्रथम उच्चारले जाणारे पूजनीय अक्षर म्हणून त्याला भगवन् असे संबोधन केले आहे. जगद्रूपी पर्णशंकु (छां.उ. २:२३:३) ज्याच्या देठाच्या आश्रयाने स्थिर आहे त्या ब्रह्माशी तादात्म्य पावलेले नामधेय *ॐकार* हाच **विश्वहेतु**, जगताचे आदिकारण आहे. **ब्रह्म**णा म्हणजे वेदाने '*ॐमित्येकाक्षरम्*' अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मेडित**. अकार हा सर्व वाचांचे मूळ असून सर्व व्यंजने आणि स्वर त्यांत सामावलेले आहेत (ऐतरेय आरण्यक २:३:६). त्यामुळे ॐकाराला **अज** ('अ'पासून झालेला) हे नाव सहजच आहे. किंवा **अ** म्हणजे ब्रह्मदेवाच्या कंठाला भेदून बाहेर पडलेला (अयोनिज) (बृहन्नारदीय पुराण १५११०) म्हणूनही ॐकाराला **अज** म्हणता येईल. **ते नमः** तुला नमस्कार असो. गायत्री इत्यादि जी ब्रह्मप्राप्तीची आलंबने आहेत त्यांत ॐकाराला श्रेष्ठ म्हटलेले आहे (कठ उ.१२१७; तैत्तिरीय. उ.१:४:१). सर्व आलंबनात आपल्या श्रेष्ठत्वाने शोभणारा असा **मालीनः**. अ, उ आणि म या तीन मात्रांनी स्थूल, सूक्ष्म आणि कारण या देहत्रयरूप विश्वाला पोसणारा म्हणून **विश्वभृत्**. या तीन मात्रांच्या उपासकांना पिप्पलादांनी शैब्याला सांगितल्याप्रमाणे (प्रश्न उ. ५) ऋक्, यजुः आणि साम या वेदांच्या द्वारा अनायासे लीलया त्या त्या लोकांना नेणारा तो **लीलाविहारी**. पंचीकरणाच्या

वार्तिकानुसार **आर्य** म्हणजे मुमुक्षूंना **भावयति** वाढवतो असा तो **आर्यभावन**. असा तू आहेस (**असि**).

**२. ईश्वरपर -** आपल्याला हवी असलेली वस्तू जर कुणाला मागायची असेल तर जसे आपण त्या व्यक्तीला त्याला अत्यंत आवडणाऱ्या नावाने हाक देतो तसेच ईश्वराला प्रणवाने - **ॐ**काराने साद देऊन स्तुती करतात. योगसूत्रानुसार (*तस्य वाचकः प्रणवः।* १:२७) आणि भ.गीतेनुसारही (*ॐ तत्सदिति निर्देशः ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।* १७:२३) हे देवाचे आवडते नाव आहे. '*उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम्। वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति।।*' या व्याख्येनुसार हे **भगवान्** ईश्वरा, तुला नमस्कार असो. तैत्तिरीय उपनिषदानुसार (*यतो वा इमानि भूतानिः..* ३:१) सर्व विश्वाचे आदिकारण म्हणून हे **विश्वहेतो**. जगाची सृष्टी करण्यापूर्वी ब्रह्मदेवाने ज्याची स्तुती केली तो तू **ब्रह्मोडित अजा**, तुला नमन असो (**ते नमः**). ज्याच्या ईक्षणमात्राने **मा** म्हणजे माया कार्यशील आहे; पण जो तिच्याने अस्पृष्ट - **अलीन** आहे, तो **मालीनः**. जगाच्या (*विश्व*) अध्यासाचे साक्षित्वाने भरण करतो (*भृत्*); किंवा '*फलमत उपपत्तेः।*' (ब्रह्मसूत्र ३:२:३८) या न्यायाने जगातील प्राणिमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्माचे फळ देऊन पोषण करतो असा **विश्वभृत्**. विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय या लीलांनी विहरणारा **लीलाविहारी**. '*परित्राणाय साधूनां*' या भ.गीतेतील (४:८) प्रतिज्ञेनुसार साधूंचे - आर्यांचे संरक्षण करणारा **आर्यभावन** असा तू आहेस.

**३. शिवपर -** पुष्पदंताने शिवमहिम्नस्तोत्रात (२७) '*शरणद गृणात्योमिति पदम्*', रुद्राध्यायांत '*ॐ नम*', विभूति अनुवाकांत '*नमः सोमाय*', '*नमस्ताराय*' ह्याना अनुसरून **ॐ नमः भगवन्**. भव, मृड आणि शिव या तीन रूपांनी विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय करणारा (रुद्राध्याय १६:२८), ज्याच्यापासून जग उत्पन्न होते तो *भव*, रजगुणोपाधिक स्रष्टा; *मृडयति* सुखावतो तो *मृड*, सत्त्वगुणोपाधिक पालनकर्ता; हरण करणारा *हर*, तमोगुणोपाधिक संहारकर्ता; आणि विशुद्धसत्त्वगुणोपाधिक मोक्षाचा आनंद देणारा तो *शिव*. महिम्नस्तोत्राच्या ३०व्या श्लोकात हेच प्रतिपादन आहे. **ब्रह्म** म्हणजे वेदाने '*विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमान च यत् सर्वो ह्येष रुद्रः*' (तै.आरण्यक

१०:१६:१) अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोदित**. नररुंडाची माळ घालणारा (**माली**) सर्ववंद्य - ईश्वर (**इन**) तो **मालीनः**. '*या ते रुद्र शिवा तनू।*' (शु.यजु.वा.सं. १६:२) या श्रुतीनुसार शिव तनूने विश्वाचे पोषण करणारा (दुसरी घोर रुद्र तनू) तो **विश्वभृत्**. नंदीवर बसून तंत्राच्या उपकरणांनी श्मशानांत भूतांसह लीलेने विहरणारा **लीलाविहारी**. आर्यांना - पाशुपतांना जोपासणारा तो **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**४. नारायणपर -** हे **भगवन्** नारायण! नारायणाथर्वशिर उपनिषदानुसार 'नारायणापासूनच रुद्र जन्मतो, नारायणापासूनच प्रजा उपजते'; तसेच श्वेतश्वतर उपनिषदानुसार (६:१८) 'जो आधी ब्रह्मदेवाला उत्पन्न करतो' तो **विश्वहेतू**. '*विष्णुः नः कं वीर्याणि प्रवोचम्।*' (ऋग्वेद सं. १:१५४:१) असा वेदांनी स्तवलेला **ब्रह्मोडित**; ज्याचे कारण नाही असा **अज**; तुला वंदन असो (**ते नमः**). **मा** म्हणजे लक्ष्मी तिला छातीशी धरल्याने तिच्यात लीन झालेला (**मालीन**); कच्छरूपाने विश्व धारण करणारा **विश्वभृत्**; लीलेने अवतार धारण करून भक्तांवर अनुग्रह करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्य** म्हणजे वैष्णव, त्यांचे सालोक्यादि मुक्ती देऊन संवर्धन करतो तो **आर्यभावन**.

**५. ब्रह्मदेवपर -** एकाक्षरकोशानुसार (१) अकार म्हणजे विष्णू; भ.गीतेतही (१०:३३) *अक्षराणां अकारोऽस्मि* असे म्हटले आहे. तेव्हा **अ** म्हणजे विष्णूपासून झालेला तो **अज**. ऋग्वेदाने (१०:१२१:१) '*हिरण्गर्भः समवर्तताग्रे*' असा गौरविलेला आद्य शरीरधारी म्हणून पूज्य या अर्थाने **भगवन्**. वेदानुसार (ऋग्वेद स. १०:१९०:१३) 'धात्याने पूर्वीप्रमाणेच विश्व निर्माण केले,' म्हणून **विश्वहेतो**. सर्व लोक '**ब्रह्म**' म्हणून स्तवन करतात असा **ब्रह्मोडित**. **ते नमः।** मरीच्यादि मानसपुत्र ज्याला तपादींनी शोभा आणतात (*मालंते*) असा त्यांचा स्वामी (**इन**) **मालीनः**. ऋग्वेदानुसार (१०:१२१:१) 'जो ही पृथ्वी आणि स्वर्ग धारण करतो' म्हणून **विश्वभृत्**. लीलया जगदुत्पादनाची क्रिया हाच ज्याचा विहार आहे असा **लीलाविहारी**. **आर्यांना** - समुच्चयोपासकांना बल देणारा असा **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**६. अग्निपर -** 'त्याने आपले तीन भाग केले' या श्रुतीप्रमाणे (बृहदारण्यक उ. १:२:३) तोच वायू आणि

आदित्यरूपाने राहतो म्हणून **विश्वहेतो**; '**अ**' म्हणजे विराट् देह त्याच्या मुखापसून झालेला (ऋग्वेद सं.१०:९०:१३) तो **अज**; **ते नमः** तुला नमस्कार असो. वेदात (**ब्रह्मणि**) (ऋग्वेद १:१:२) 'अग्नी पूर्वीच्या ऋषींनी स्तवलेला आहे' म्हणून **ब्रह्मोडित**. तेजस्वी असल्याने **मालीनः**. जठराग्नीच्या रूपाने विश्वांतील प्राणिमात्राचे भरणपोषण करणारा **विश्वभृत्**. देवांचा दूत होऊन जो त्याना हवि पोचविण्याची क्रिया लीलेन पार पाडीत विहरतो तो **लीलाविहारी**. ईशोपनिषदांतील प्रार्थनेनुसार धर्मनिष्ठांना (**आर्यान्**) सुपथावर नेऊन त्यांचे संवर्धन करतो (**भावयति।**).

**७. वायुपर -** 'अतति' म्हणजे व्यापतो ते आकाश म्हणजेच **अः**; त्यापासून झालेला (तैत्तिरीय उ.२:१:१) **अजः**; तुला नमस्कार असो. प्रश्नोपनिषदात प्राणाच्या उपाधीने वायूचे विश्वहेतुत्व प्रतिपादलेले आहे. '*प्राणो ब्रह्मेति व्यजानात्*' या वचनाने तैत्तिरीय उपनिषदांत (३:३) शोभून दिसणारा **माली**; '*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्*' (बृहदारण्यक उ. ३:७:२) यानुसार इंद्रियांचा प्रवर्तक आणि बलवान् असल्याने राजा (**इनः**); वृत्तींच्या द्वारा विश्वाचा पोषक (**विश्वभृत्**); प्राणोपासक **आर्यां**चे संवर्धन करणारा (**भावयति।**).

**८. सूर्यपर -** पुरुषसूक्तांत विराट पुरुषाच्या (**अः**) चक्षूंपासून झालेला म्हणून **अजः**; वेदत्रयीमय असल्याने **ॐ**कारस्वरूप; प्रातः माध्याह्न आणि सायं असा त्रिकाळ पूजिला जाणारा **भगवान्**; मैत्रायणी उपनिषदानुसार (६:३७) वृष्टी, अन्न आणि प्रजा या परंपरेने **विश्वहेतु**; तैत्तिरीय आरण्यकांत 'हा आदित्यच ब्रह्म आहे' अशी आणि ऋग्वेदांत (१:११५:१) सूर्याला जगताचा आणि त्यांतील सर्व जीवांचा आत्मा अशी त्याची स्तुती केल्याने **ब्रह्मोडित**; '**मा**' म्हणजे शोभा तिने '**अलति**' व्यापतो तो **मालीनः**; ऋग्वेदानुसार (३:५९:१) 'पृथ्वी आणि स्वर्ग यांना आधार देणारा' **विश्वभृत्**; लीलया प्रकाश करीत वरचेवर भ्रमण करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्यां**ना म्हणजे गायत्रीचा जप करणाऱ्यांचा पोषक **आर्यभावन**.

**९. रामपर -** अज म्हणजे रघूचा पुत्र, त्याच्या गोत्रांत जन्मलेला **आज** म्हणजे रामचंद्रप्रभू. राक्षसांचे निर्दलन केल्याने

**विश्वहेतु**; प्रथम भूमीवर अवतरण्यासाठी व नंतर रावणवधाप्रीत्यर्थ ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**; **मा** म्हणजे माया अर्थात् सीता, तिच्यात **लीन** म्हणजे (स्त्रियांत आसक्त होण्याचे परिणाम लोकांत प्रदर्शिण्यासाठी) आसक्त तो **मालीन**. तिच्यासाठीच राक्षसांचे निर्दलन केले. धर्मस्थापनेने विश्वाचा सांभाळ केला म्हणून **विश्वभृत्**. लीलेने क्षत्रिय रूप घेऊन विहरणारा **लीलाविहारी**. बिभीषण, सुग्रीव, हनुमान अत्यादि आर्यांचासंवर्धक अर्थात् **आर्यभावन**.

**१०. कृष्णपर -** श्रीमद्भागवताच्या उक्तीप्रमाणे '*कृष्णस्तु **भगवान्** स्वयम्।*' (१:३:२८). '*अजोऽपि सन्नव्ययात्मा*' ह्या गीतोक्तीनुसार **अज**. गीतेत (९:४) त्यांनीच '*मया ततमिदं सर्वं जगत्*' असे सांगितल्याप्रमाणे **विश्वहेतु**. ब्रह्मदेवाचा गर्वपरिहार केल्यावर त्याने स्तुती केलेला **ब्रह्मोडित**. वन**माली** तर तो आहेच. **इनः** म्हणजे क्षत्रिय. दैत्यांचा निग्रह करून विश्वाचे रक्षण करणारा **विश्वभृत्**. वृंदावनांत गोपींसह व द्वारकेत सोळा हजार स्त्रियांसह विलास करणारा गोपांसह क्रीडा आणि अर्जुनाचे सारथ्य अशा **लीला** करीत **विहर**णारा. आर्य म्हणजे यादव त्यांचा रक्षणकर्ता म्हणून **आर्यभावन**.

**११. गणपतिपर -** *अजा*चा म्हणजे शिवाचा पुत्र **आजः**; अथर्वशीर्षात '*सर्वं जगदिदं त्वत्तो जायते*' असा स्तवलेला **विश्वहेतु**. निर्विघ्नतेसाठी ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**. प्रवालांच्या माळा घालणारा **माली**. विघ्नांचा **इन** (राजा). लीलेने नरगजरूपाने विहरणारा **लीलाविहारी**. गाणपत्यांचा (आर्यांचा) पोषक **आर्यभावन**.

**१२. देवीपर -** देवीच्या संदर्भांत या सर्व विशेषणांच्या स्त्रीलिंगी रूपांची योजना करावी. ***ॐ भगवती विश्वहेतुः ब्रह्मोडिता, अजा ते नमः। मालिनी विश्वभृता लीलाविहारिणी आर्यभावना असि।***

**श्रीदत्तपर -** *अज* म्हणजे ब्रह्मदेवाचा नातू **आजः**. '*ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना॥*' या व्याख्येनुसार जो संपूर्ण ऐश्वर्य, संपूर्ण धर्म, संपूर्ण यश, समग्र श्री, समग्र वैराग्य आणि समग्र मोक्ष यांनी युक्त आहे असा **भगवान्**. दत्तोपनिषदानुसार 'जो विश्वाची निर्मिती करतो आणि विश्वाचा सांभाळ

करतो' तो **विश्वहेतु** आणि **विश्वभृत्**. योगेश्वर या अर्थाने, *मा* म्हणजे *माया* तिच्यांत *अलीन* अनासक्त म्हणून **मालीन**. लीलेने अवधूतवेष घेऊन गंगास्नानादी विहार करणारा **लीलाविहारी**. भक्ताचे पालन करणारा **आर्यभावन**. तापिनी उपनिषदांत भगवान विष्णूंनी ब्रह्मदेवाला 'दत्तात्रेय नावाच्या माझ्या सात्त्विक रूपाची उपासना कर,' असे सांगितले आहे. तसेच शांडिल्याला अथर्वणाने '*शांतं आत्मप्रकाशं दत्तं ध्यायमान*' असे सांगितले आहे. त्यावरून दत्तच परब्रह्म आहेत. 'याप्रमाणे श्रीगुरूंच्या प्रेरणेने यथामती विवेचन केले.'

ग्रंथाच्या आरंभी गुरुस्तुतीच्या पहिल्या श्लोकात श्रीविष्णू, शिव, गणेश, सूर्य, शक्ती इत्यादि रूपे घेणाऱ्या सद्गुरू दत्तात्रेयाचे प्रतिपादन केले. अंती मंगलाचरणाच्या या श्लोकात बारा मुख्य देवतांची आणि दत्तप्रभूंची स्तुती एकाच श्लोकाने करून त्या सर्वांचा अभेद सिद्ध करून श्रीदत्तप्रभूच परब्रह्म आहेत हा सिद्धांत प्रस्थापित करून समारोप केला आहे. यात उपक्रम आणि उपसंहार यांची एकवाक्यता दिसून येते आणि श्रीदत्तप्रभू हेच या ग्रंथाचे तात्पर्य आहेत हे निरपवाद सिद्ध होते.

**संहितेऽयं द्विसाहस्री त्रिकांडाभीष्टदा सती। व्याख्याताऽजोऽनया प्रीयाच्छ्रीदत्तोऽयं त्र्यधीश्वराः।।**

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पाचवा आणि प्रथमपासून तेविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ योगरहस्य ।।

**श्रेष्ठपुंजन्मसाफल्यं कार्यं योगत्रयाश्रयात् । समाख्यातद्विसाहस्री-संहितासंग्रहस्त्वयम् ।।१।।**
**भक्तिं विना न साफल्यं कर्मणः कर्मणा विना । न च ज्ञानं विना ज्ञानान् न मोक्षो यस्य कस्यचित् ।।२।।**
**न ज्ञानं जीवति प्राणे मनस्यपि लयं नयेत् । यस्तौ गच्छति मोक्षं स योगी नान्यः कथंचन ।।३।।**

श्रेष्ठ+पुं+जन्म+साफल्यं योग+त्रय+आश्रयात् कार्यम्। अयं समाख्यात+द्वि+साहस्री+संहिता+संग्रहः।१। भक्तिं विना कर्मणः साफल्यं न। कर्मणा विना च ज्ञानं न। विना ज्ञानात् यस्य+कस्य+चित् मोक्षः न।२। जीवति प्राणे, मनसि अपि, ज्ञानं न। यः तौ लयं नयेत् सः योगी मोक्षं गच्छति। अन्यः कथंचन न।३।

श्रेष्ठ अशा नरजन्माचे साफल्य करावयाचे असेल तर ज्ञान, कर्म व भक्ती अशा तीनही योगांचा आश्रय करावा लागेल, हाच आतापर्यंत सांगितलेल्या द्विसाहस्री संहितेचा सारभूत अर्थ आहे. या संहितेत पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोगाचे, पुढच्या पाच अध्यायांत कर्मयोगाचे आणि अंतिम पाच अध्यायांत भक्तियोगाचे निरूपण आहे. चौदाव्या अध्यायाच्या आरंभी टीकेत ज्ञानयोगाचा अधिकार येण्यासाठी कर्मयोगाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. तसेच एकोणिसाव्या अध्यायाच्या सुरुवातीला ज्यांचे चित्त शुद्ध झाले आहे त्यांना ध्यानसिद्धीकरिता भक्तियोग सांगितला आहे. प.पू. श्रीयोगिराज गुळवणीमहाराज आपल्या योगरहस्यावरील टीकेत म्हणतात, 'याप्रमाणे वेदप्रमाणसिद्ध कर्मयोग, त्यातील न्यूनाधिकत्व दोष दूर करून त्याची पूर्णता करणारा भक्तियोग व या दोहोंचेही फल असणारा मोक्षदायक ज्ञानयोग हे तीनही योग आपल्या ठिकाणी स्थिर होण्याकरिता प्रयत्नशील राहणे हेच मनुष्य जन्माचे खरे साफल्य आहे आणि द्विसाहस्रीसहितेचा हाच सारांश आहे. असे या प्रथम लोकात श्रीमहाराजांनी सांगितले आहे.'१. भक्तीवांचून कर्माचे फळ मिळत नाही; कर्माशिवाय ज्ञान होत नाही आणि ज्ञानावाचून कुणाचाही मोक्ष होत नाही.

**चले प्राणे चलं चित्तं निश्चले निश्चलं तयोः । नष्ट एकतरे नाशो द्वयोरपि स योगतः ।।४।।**

चले प्राणे चित्तं चलम्। निश्चले निश्चलम्। तयोः एकतरे नष्टे द्वयोः अपि नाशः। सः योगतः (भवति)।४।

ज्ञानाशिवाय मोक्ष नाही हे वेदांताचा प्रमुख सिद्धांत आहे. त्याचा विचार पुढे बोधरहस्यात येणारच आहे. कर्मयोग म्हणजे वर्णाश्रमानुसार आपल्याला विहित असलेले कर्म करणे. गीतेच्या '*यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं तम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः।।१८:४६।।*' संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, '*म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे, तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आली। आकाश भूतें।।१४।।*' ज्ञानासाठी जसे कर्म आवश्यक आहे तसेच ते चित्तशुद्धीद्वारा भक्तीच्या प्रादुर्भावासाठीही आवश्यक आहे. या अभिप्रायानेच श्रीमहाराज म्हणतात की भक्तीशिवाय कर्माचे साफल्य नाही.२.

प्राण आणि मन जोवर जीवित आहेत तोवर ज्ञान होणार नाही असा सिद्धांत इथे श्रीस्वामिमहाराजांनी मांडला आहे. प्राणाचे जीवन म्हणजे इडा आणि पिंगला या नाड्यांतून (डाव्या आणि उजव्या नाकपुड्यांतून) प्राणाचे वहन. तसेच मनाचे जीवन म्हणजे संकल्प. यो दोन्हींचा जो लय करतो, या दोन्हींचा निरोध करतो तोच योगी मोक्ष पावतो. अन्य कुणीही नाही. वैद्यकशास्त्राच्या सिद्धांतानुसार श्वासोच्छ्वासरूपी प्राणाचे संचलन थांबणे हे मृत्यूचे लक्षण आहे. पण योगात हे मृत्यूशिवायही शक्य आहे. त्याचप्रमाणे 'आपापल्या विषयांचे ग्रहण इंद्रियांचे जीवन आहे; सतत नाना प्रकारचे संकल्प-विकल्प करून विविध वृत्ती उठवणे हे मनाचे जीवन आहे. त्यांचा निरोध इथे विवक्षित आहे. प्राण किंवा मन यांचा स्वरूपनाश नाही.' (हठयोगप्रदीपिका टीका ४:१५). योगशास्त्रानुसार ब्रह्मरंध्रात (मस्तकात) प्राणाची निश्चल स्थिती हाच प्राणाचा लय. तसेच इतर विषयांपासून निवृत्त ध्येयाकार होऊन स्थिरावणे हा मनाचा लय होय. मूर्छा किंवा झोप यांपेक्षा ही वेगळी अवस्था आहे.३.

**भक्तिक्रियाज्ञानयोगान् मुक्तिरुक्तापि तत् त्रयम् । ज्ञेयं साष्टाङ्गयोगान्तर्गतं द्वैधमतोऽत्र नो ।।५।।**

भक्ति+क्रिया+ज्ञान+ योगात् मुक्तिः उक्ता। तत् त्रयं स+अष्ट+अङ्ग+योग+अन्तः+गतम्। ततः अत्र द्वैधं नो।५।

**अष्टांगयोगांत तीनही योगांचा अंतर्भाव.** प्राण चालतो तोपर्यंत चित्तही (मन) चालते. या दोन्हींपैकी एक स्थिर झाले की दुसरेही थांबते. असे प्राण आणि मन परस्परांशी निगडित आहेत. या दोन्हींचे स्थैर्य संपादन करण्यासाठी योगाची आवश्यकता इथे महाराजांनी प्रतिपादिली आहे. हीच योगाची व्याख्याही होते. पतंजलींच्या व्याख्येतला '*चित्तवृत्तिनिरोधः*' यात समाविष्टच आहे. आत्मज्ञानासाठी म्हणजेच मोक्षासाठी योगाची आवश्यकता प्रतिपादणारी वचने वेद-शास्त्र-पुराणे यांतून प्रचुर आहेत. त्यांचा निर्देश इथे विस्तारभयाने करता येत नाही. श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणांत (२:२:१-२) सांगितल्याप्रमाणे 'सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्री-पुरुष, बाल, युवा, वृद्ध यांना योगाभ्यासाचा अधिकार आहे. आणि त्यानी अभ्यास केला तर ते सिद्धीही प्राप्त करू शकतात.'४. श्रीमद्भागवतात उद्धवगीतेत (११.२०.६) '*योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया। ज्ञानं कर्म च भक्तिश्च नान्योपायोऽस्ति कर्हिचित।।*' असे प्रतिपादन केलेले आहे. या तीन्हींपेक्षा वेगळा योगच हा मोक्षाला उपाय कसा ठरतो? या आक्षेपाच्या समाधानासाठी श्रीमहाराज सांगतात, 'हे तीनही उपाय अष्टांगयोगात अंतर्भूत आहेत. त्यामुळे इथे कांही विरोधाचा प्रश्नच येत नाही.' यापैकी योगाचे आचार्य पतंजली यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी अशी योगांची आठ अंगे सांगितली आहेत. संप्रज्ञात समाधी हा आठ अंगांपैकी शेवटचे अंग असून यांचा अंगी जो योग तो म्हणजे असंप्रज्ञात समाधी होय. त्यांपैकी **नियम** या अंगाची व्याख्या करणारे सूत्र '*शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः*।२:३२।' यांपैकी तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या तिघांचे पतंजलींनी **क्रियायोग** असे वेगळे वर्गीकरण केले आहे (२:१). उपवास, कृच्छ्र, चांद्रायणादि व्रतांनी शरीर झिजवणे म्हणजे **तप**. उपनिषत्, शतरुद्रीय, प्रणव इत्यादिकांचा जप म्हणजे स्वाध्याय आणि नवविधा भक्ती म्हणजे **ईश्वरप्रणिधान**. **स्वाध्याय** या नियमात मोक्षाच्या साधनांचा अभ्यास समाविष्ट आहे. हेच ज्ञानयोगातील श्रवण आणि मनन होत. ज्ञानयोगाचा

**नात्यश्नतोऽनश्नतोऽति-सुप्तस्यैष न जाग्रतः । युक्तचेष्टाहारनिद्रा-गतेर्योगो भवेत्सुखः ।।६।।**

न अति+अश्नतः, न अन्+अश्नतः, (न)अति+सुप्तस्य, न जाग्रतः (योगो भवेत्)। युक्त+चेष्टा+आहार+निद्रा+गतेः सुखः योगः भवेत्।६।

तिसरा भाग निदिध्यासन तो योगाच्या **ध्यान** या अंगाशी समानार्थक आहे. याच क्रियायोगात कर्मयोग आणि भक्तियोग यांचाही अंतर्भाव आहे. ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम कर्मानुष्ठान म्हणजे कर्मयोग. श्रवण, कीर्तन इत्यादि नवविधा भक्तीला साधन भक्ती म्हणतात. दुसरी फलरूप भक्ती म्हणजे ईश्वराविषयी प्रेम. 'ईश्वरचरणाविषयी अंतःकरणात उत्पन्न झालेला निर्व्याज, अव्यभिचारी असा अविच्छिन्न प्रेमप्रवाह म्हणजे प्रेमभक्ती. अशी नारायणतीर्थांची व्याख्या आहे. चित्त प्रेमार्द्र होऊन ईश्वराकार होणे म्हणजे प्रेमभक्ती असे मधुसूदन-सरस्वती म्हणतात.' ही भक्ती अष्टांगयोगातली संप्रज्ञात समाधीच आहे असे भक्तिशास्त्रकार मानतात. १९व्या अध्यायाच्या ३ऱ्या श्लोकात हा विचार श्रीमहाराजांनी मांडलेला आहे. तो पुन्हा वाचण्यासारखा आहे. या श्लोकातील तीनही मोक्षोपाय योगात अंतर्भूत आहेत असे म्हणताना श्रीस्वामिमहाराजांची समन्वयात्मक दृष्टी समजून घेतली नाही तर योग आणि इतर साधने यांचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व असा कदाचित् वाद उद्भवू शकतो. तीनही मोक्षाचे मार्ग परस्परपूरक आहेत आणि त्यांच्यात कांहीच विरोध नाही हा खरा या श्लोकाचा आशय आहे. प.पू. योगिराजांनी म्हटल्याप्रमाणे, 'कोणत्याही प्रकारे अभिनिवेश न ठेवता ईश्वरस्मरणपूर्वक आपापले साधन निष्ठेने करून साधकाने आत्मकल्याण साधण्याकडे विशेष लक्ष द्यावे.'५.

या श्लोकात आहारविहारादींचे नियमन सांगितले आहे.

**आहार** फार जास्ती किंवा फार कमी नसावा. आवश्यक आणि मानवेल तेवढाच आहार घ्यावा. कमी घेतला तर शरीर आणि मन अशक्त होईल व अभ्यासाला साथ देणार नाही. जास्त घेतला तर आळस, झोप आणि रोग यांना आमंत्रण दिल्यासारखे होईल. '*अर्धमानस्य सव्यञ्जनस्य तृतीयमुदकस्य तु। वायोः संचरणार्थाय चतुर्थमवशेषयेत्।।*' अगदी पोटभर जेवू नये. अर्धे पोट भरेल एवढेच अन्न घ्यावे.

**तस्माद्वैराग्यतोऽभ्यासं गुरोरग्रे वितन्वतः । योगस्य प्राप्य संसिद्धिं विद्वान्मुक्तो भवेद्द्रुतम् ।।७।।**

तस्मात् वैराग्यतः गुरोः अग्रे अभ्यासं वितन्वतः योगस्य संसिद्धिं प्राप्य विद्वान् द्रुतं मुक्तः भवेत्।७।

चौथा भाग पाणी प्यावे आणि उरलेला चौथा भाग वायूच्या संचरणाला रिक्त ठेवावा असे भारतीय आहारशास्त्र सांगते. आहारही आश्रमानुसार अधिक-उणा करावा असे स्मृतिग्रंथांत सांगितले आहे. '*अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः षोडशारण्यवासिनः। द्वात्रिंशत्तु गृहस्थस्य यथेष्टं ब्रह्मचारिणाम्।।*' संन्याशाने आठ घास (तोंड फार न पसरता), वानप्रस्थाने सोळा, गृहस्थाने बत्तीस तर ब्रह्मचाऱ्याने कितीही घास घ्यावेत. युक्त आहार यात आहाराच्या पावित्र्याचाही विचार अपेक्षित आहे. शुचितेने सिद्ध केलेला, देवाला अर्पण केलेला, मित (मोजका) आणि सात्त्विक आहार घ्यावा.

**निद्रा**सुद्धा योग्यच प्रमाणात घेतली पाहिजे. रात्री उशीरा झोपणे आणि सकाळी उशीरा उठणे हे शरीराला वा मनालाही हितावह नाही. सूर्यास्तानंतर ३-४ तासांनी झोपावे व सूर्यास्तापूर्वी एक-दीड तास आधी उठावे असा सर्वसाधारण नियम आहे. अधिक कार्यमग्नता, अधिक हालचाल आणि अधिक प्रवास हे योगाभ्यासाला बाधक आहेत.

'*अत्याहारः प्रयासच प्रजल्पो नियमग्रहः। जनसंगश्च लौल्यंच षड्भिर्योगो विनश्यति।। उत्साहात्साहसाद्धैर्यात्तत्वज्ञानाच्च निश्चयात्। जनसंगपरित्यागात्षड्भिर्योगः प्रसिद्ध्यति।।*' अधिक आहार, अतिश्रम, अतिबडबड, उपवास, फलाहार इत्यादि नियम धरणे, लोकांत जास्ती वावरणे आणि कामासक्ती ह्या सहा गोष्टी योगाला बाधक आहेत. मी चित्त स्थिर करीनच असा उत्साह, साध्य-असाध्य हा विचार दूर सारून साधनाकडे प्रवृत्त होणे हे साहस; यावज्जीव प्रयत्न करीत राहणे, कधीही खिन्न न होणे हे **धैर्य**; संपूर्ण दृश्य विषय, मृगजळाप्रमाणे आभासमात्र अस्थिर आहेत, फक्त परमात्माच स्थिर आहे ही दृढबुद्धी म्हणजे **तत्त्वज्ञान**; शास्त्राचे व गुरूंचे सांगणे पूर्णपणे खरे आहे असा विश्वासरूप **निश्चय**; योगाभ्यासाला प्रतिकूल अशा विषयासक्त **लोकांच्या संगतीचा त्याग**; या सहा गुणांनी योगाची फलसिद्धी होते.६.

**क्षाराम्लतिक्तकटुरुक्षकदन्नशाक-स्त्र्यग्न्यध्वभाङ् न लभतेऽकुशलोऽस्य सिद्धिम् ।**
**शुण्ठीसितासुमनशालिसदन्नमुद्ग-चक्षुष्यशाकघृतदुग्धसदम्बु पथ्यम् ।।८।।**

क्षार+अम्ल+तिक्त+कटु+रुक्ष+कदन्न+शाक+स्त्री+अग्नि+अध्व+भाक् अकुशलः अस्य सिद्धिं न लभेत्। शुण्ठी+सिता+सुमन+शालि+सत्+अन्नम् उद्ग+चक्षुष्य+शाक+ घृत+दुग्ध+सत्+अम्बु पथ्यम्।८।

वैराग्यपूर्वक गुरूच्या दृष्टीसमोर अभ्यास करणाऱ्या साधकाला, योगाची फलसिद्धी प्राप्त होऊन, तो आत्मज्ञान संपन्न होतो व शीघ्र मुक्त होतो.७. खारट, आंबट, कडू, तिखट, स्निग्ध नसलेले जोधळे, उडीद इत्यादि धान्य, आणि प्रायः सर्व भाज्या असे पदार्थ, विशेष आवडीने खाणारा, स्त्रीसंग करणारा कामातुर, अग्नीजवळ बराच वेळ शेकत बसणारा, नेहेमी पायी प्रवास करणारा आणि अभ्यासात हुषारी नसणारा, अशा मनुष्याला योगाची फलसिद्धी प्राप्त होत नाही. सुंठ, साखर, गहू, तांदूळ, वरई, सावे, मूग, डोळ्याला हितकारक अशा भाज्या, तूप, दूध, उत्तम शुद्ध पाणी हे सर्व योगाभ्यास करणाऱ्याला पथ्यरूप हितावह असे आहे. बहुतेक सर्वच शाका (पालेभाज्या) डोळ्यांना हितावह नाहीत. चक्षुषी म्हणजे डोळ्यांना हितावह अशा पाच भाज्या टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी दिल्या आहेत. त्यांची नावे संस्कृत व कंसांत हिन्दी दिली आहेत. जीवन्ती (जीयाति, हरणवेल, हरणदोडा), वास्तु (हेतुया, बथुवा, चंदनबथुवा), मत्स्याक्षी (छछमछरी, मछेछी, सोमवल्लरी), मेघनादा(मा) (चवराई, मोथ) म्हणजे चवळी, पुनर्नवा (करला, घेटुळी). अष्टांगमिथुनाने स्त्रीसेवन, शेकण्याने अग्निसेवन, प्रवासाने अध्वसेवन ही योगाभ्यासाला प्रतिकूल आहेत.८.

**सद्देशे मठिकामध्ये निश्चिन्तो गुरुशिक्षितः । कुशाजिनांशुकेष्वेव हठयोगं समभ्यसेत् ।।९।।**
**गुदमेण्ढ्रोर्ध्वस्थगुल्फमासीनो यतगुः समः । भ्रूमध्यदृग्वान्यपीठैः सिद्धं तत्राप्यदोऽस्ति सत् ।।१०।।**

सत्+देशे, मठकि+मध्ये निश्चिन्तः गुरु+शिक्षितः कुश+अजिन+अंकुशेषु एव हठयोगं समभ्यसेत्।९। गुद+मेण्ढ्र+ऊर्ध्व+गुल्फ+आसीनः यत+गुः समः वा अन्य+पीठैः। अदः सिद्धं तत्र अपि सत् अस्ति।१०।

योगाभ्यासाचे स्थान पवित्र असावे. याविषयी हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे, '*सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे। धनुः प्रमाणपर्यन्त शिलाग्निजडवर्जिते।। एकान्ते मठिकामध्ये स्थातव्यं हठयोगिना।।* हठयोगप्रदीपिका १:१२।।' ज्ञानेश्वरीत ६व्या अध्यायात ११व्या श्लोकावरील भाष्य वाचण्यासारखे आहे. एखाद्या छोट्याशा झोपडीत, दर्भासनावर कृष्णाजिन आणि त्यावर स्वच्छ धुतलेले वस्त्र अशा आसनावर बसावे. निश्चिंत या शब्दाने प्रापंचिक विवंचनापासून शक्य तो दूर राहण्यास सुचविले आहे. हठयोगाचा निर्देश इथे केला आहे. याची व्याख्या टीकेत अशी केली आहे. 'हकार' म्हणजे सूर्य म्हणजेच प्राण आणि 'ठकार' म्हणजे चंद्र अर्थात् अपान. त्या दोहोंचा - प्राण आणि अपान यांचा योग म्हणजे हठयोग.

ह्या हठयोगाचा अभ्यास गुरूंच्या मार्गदर्शनाखालीच करावा हे **गुरुशिक्षितः** या शब्दाने सुचविले आहे. ही सूचना अतिशय महत्त्वपूर्ण आहे. पुढे सांगितलेला योगाभ्यास पुस्तकात वाचून करण्यात धोका आहे. **विद्वान् आणि अनुभवसंपन्न गुरूंच्या उपस्थितीतच हा अभ्यास केला पाहिजे**.९. गुद आणि वृषण यांच्यामध्ये असलेल्या शिवणीवर एका पायाची टाच व शिश्नाच्या वर दुसरी टाच ठेवून, इंद्रियांचा निग्रह करून व दृष्टी भ्रूमध्यावर स्थिर करून बसल्याने सिद्धासन होते. ह्या किंवा इतर आसनावर बसावे. पण हे सिद्धासनच सर्व आसनात श्रेष्ठ आहे. ह्या आसनाच्या अभ्यासाने मूलबंध, उड्डियान बंध व जालंधर बंध हे तीनही अनायास लागतात आणि साधक उन्मनी अवस्थत जातो. (हठयोगप्रदीपिका १:४२) बारा वर्षे सिद्धासनाचा अभ्यास केल्याने योगसिद्धी प्राप्त होते.१०.

**वायुं शक्त्येडयापूर्य हृदि स्थाप्य हनुं जपन् । हंसं शक्त्या कुम्भयित्वा पश्चादाकर्षितोदरः ।।११।।**
**शनैर्विरेचयेदेष प्राणायामः सुसिद्धिदः । पञ्चर्ध्याह्न्यह्न्यशीत्यन्तैः प्रतिसन्ध्यसुयामकैः ।।१२।।**
**गन्तव्यमार्गस्थशक्ति-चालनाद् भस्रया भवेत् । नाडीशुद्धिस्त्रिमासोर्ध्वं प्राणो याति लयं सहृत् ।।१३।।**

वायुं शक्त्या ईडया आपूर्य हनुं हृदि स्थाप्य हंसं जपन् शक्त्या कुम्भयित्वा, पश्चात् आकर्षित+उदरः।११। शनैः विरेचयेत्। एष प्राणायामः सु+सिद्धि+दः। अह्नि अह्नि पंच+ऋध्या अशीति+अन्त्यैः प्रति+सन्धि+असु+यामकैः।१२। भस्रया गन्तव्य+मार्गस्थ+शक्ति+चालनात् त्रि+मास+ऊर्ध्वं नाडी+शुद्धिः भवेत्। प्राणः सहृत् लयं याति।१३।

शक्तीप्रमाणे डाव्या नाकपुडीने वायू आत घेऊन म्हणजे **पूरक** करून, हृदयावर हनुवटी ठेवून गायत्री-मंत्र किंवा सोहंमंत्र यांचा मानसिक जप करीत राहून, शक्तीप्रमाणे **कुंभक** करून, नंतर आपले पोट आत ओढून(११) साधकाने तो वायू हळूहळू उजव्या नाकपुडीने बाहेर सोडावा म्हणजे **रेचक** करावा. हा पूरक, कुंभक व रेचक मिळून एक प्राणायाम होतो. तो उत्तम सिद्धी देणारा आहे. असे प्राणायाम प्रतिदिवशी त्रिकाल करावेत व ते पाच पाच या प्रमाणाने वाढवून ऐंशीपर्यंत न्यावेत.१२. तसेच, पुढे सांगितलेली भस्रिका व प्राणवायूच्या गमनाला योग्य अशा सुषुम्णा मार्गांतील शक्तीचे चालन करावे. याप्रमाणे प्राणायाम, भस्रिका व शक्तिचालन या तीन साधनांच्या अभ्यासाने तीन महिन्यांनंतर सर्व नाड्यांची शुद्धी होते आणि प्राणवायू चित्तासह विलीन होतो.१३. हा सुषुम्णेत प्रवेश केलेला प्राण ब्रह्मरंध्रात (टाळू) जाऊन तिथे दोन पळे आणि पाच विपळे (५० सेकंद) इतका वेळ स्थिर झाला की एक **प्राणायाम** होतो.१४. इथून हा काळ बारापट वाढत गेला की अनुक्रमे **प्रत्याहार** (१०मिनिटे), **धारणा** (दोन तास), **ध्यान** (चोवीस तास) आणि **समाधी** (बारा दिवस) सिद्ध होतात. बारा दिवसांची **समाधी** ही अत्यंत दुर्लभ आहे.१५.

**प्राणायाम** म्हणजे आपल्या शरीरात संचार करणारा जो **प्राण** नामक वायू आहे त्याचा **आयाम** म्हणजे निरोधन. याचे तीन प्रकार आहेत. शरीराबाहेरील वायू आत ओढून घेणे याला **पूरक** म्हणतात. तो कुंभ म्हणजे घागरीत भरल्यासारखा शरीरात धरून ठेवणे याला **कुंभक** म्हणतात. आणि तो वायू बाहेर सोडणे याला **रेचक** असे नाव आहे.

**लीनः सपञ्चविपल-द्विपलं सोऽसुयामकः । ब्रह्मरन्ध्रे वर्धमानः प्रत्याहारादयः स तु ।।१४।।**

स+पञ्च+विपलं+द्विपलं ब्रह्मरंध्रे लीनः सः असु+यामकः। सः वर्धमानः तु प्रत्याहार+आदयः।१४।

बहुतेक कुंभक पूरकानंतर केले जातात. त्यांना पूरकपूर्वक कुंभक म्हणतात. सूर्यभेदन, उज्जायी इत्यादि त्यांची उदाहरणे आहेत. रेचकानंतर प्राण बाहेरच अडवून धरणे ह्याला रेचकपूर्वक कुंभक (बहिःकुंभक) म्हणतात. रेचक किंवा पूरक न करता प्राण नाकपुड्यांतच धरून ठेवणे याला केवलकुंभक म्हणतात. ('*न रेचको नैव च पूरकोऽत्र नासापुटे संस्थितमेव वायुं। सुनिश्चलं धारयते क्रमेण कुंभाख्यमेतत्प्रवदन्ति तज्ज्ञाः।।*')

**प्राणायामाच्या श्रेणी -** प्राणायामाच्या श्रेणी त्याच्या कालावरून ठरतात. त्यासाठी मात्रा हे माप आहे. साधारणतः मनुष्य झोपलेला असताना त्याचा एक श्वासोछ्वास व्हायला लागणारा काळ म्हणजे मात्रा. हा काळ गुडघ्यावरून हात फिरवून एक चुटकी वाजवायला लागणाऱ्या काळाइतका स्कंद पुराणात सांगितला आहे. बारा मात्रांचा प्राणायाम साधारण, चोवीस मात्रांचा मध्यम आणि छत्तीस मात्रांचा उत्तम प्राणायाम होतो. साधारण प्राणायामाने घाम येतो, मध्यम प्राणायामाने शरीर कापते आणि उत्तम प्राणायामाने प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिरावतो.

प्राणायाम प्रातः, माध्याह्न, सायं आणि मध्यरात्री करावेत. मध्यरात्री करण्यास अशक्त असेल त्याने त्रिकाल करावेत. वर सांगितल्याप्रमाणे एका वेळी ऐंशी प्राणायाम केल्याने रोज २४० प्राणायाम होतात. तीन महिन्यांत २१६००, म्हणजे २४ तासांतील श्वासांच्या संख्येइतके प्राणायाम होतात. हे प्राणायामांचे एक पुरश्चरणच होते. याचे फळ नाडीशुद्धी हे सांगितले आहे. नाडीशुद्धीची लक्षणे हठयोगप्रदीपिकेत २ऱ्या उपदेशात पुढीलप्रमाणे दिली आहेत. '*यदा तु नाडीशुद्धिः स्यात्तदा चिन्हानि ब्राह्यतः। कायस्य कृशताकांतिस्तदा जायेत निश्चितम्।।१९।। यथेष्टधारणं वायोरनलस्य प्रदीपनम्।नादाभिव्यक्तिरारोग्यं जायते नाडिशोधनात।।२०।।*

**स्वकालद्वादशगुणोत्तरकालावधिः स्मृतः । समाधिर्द्वादशदिन-साध्यः परमदुर्लभः ।।१५।।**

स्वकाल+द्वादश+गुण+उत्तर+काल+अवधिः स्मृतः। समाधिः द्वादश+दिन+साध्यः परम+दुर्लभः।१५।

शरीर कृश परंतु तेजस्वी होणे, वायु कितीही वेळ धरून ठेवता येणे, जठराग्नी प्रदीप्त होणे, आपल्या शरीरांत अनाहत नाद ऐकू येणे आणि आरोग्य ही ती लक्षणे आहेत. प्राणायामाच्या पूर्वतयारीसाठी शरीरातील कफ, लठ्ठपणा इत्यादि दोषांच्या शुद्धीसाठी धौती, बस्ती, नेति, त्राटक, नौली आणि कपालभाति अशा **षट्क्रिया** हठयोगात सांगितल्या आहेत. याज्ञवल्क्यादी आचार्यांच्या मते हे दोष प्राणायामानेच दूर होतात. त्यामुळे श्रीमहाराजांनी इथे षट्क्रिया सांगितल्या नाहीत. कपालभाति पुढे सांगितली आहे.

**बंधत्रय -** पूरकानंतर हनुवटी छातीला टेकून कुंभक करावा असे जे वर सांगितले आहे त्या क्रियेला **जालंधरबंध** असे म्हणतात. (*कंठाकुंचनपूर्वकं चिबुकस्य हृदि स्थापनं जालधरबंधः।*३) कुंभकानंतर रेचकाच्या आधी पोट आत पाठीकडे ओढायला सांगितले आहे तो **उड्डियान बंध** होय. (*प्रयत्नविशेषेण नाभिप्रदेशस्य पृष्ठत आकर्षणमुड्डियानबंधः*) पूरकाच्या आधी **मूलबंध** (शिवणीवर टाचेने दाबून गुदद्वाराचे आकुंचन) केला जातो. (*पार्ष्णिभागेन (गुल्फयोरधः प्रदेशः) योनिस्थानसंपीडनपूर्वकं (योनिस्थानं गुदमेढ्रयोर्मध्यभागं) गुदस्याकुंचनं मूलबंधः*). पूरकाच्या आधी मूलबंध व नंतर जालंधरबंध केल्याने प्राण ब्रह्मनाडीत म्हणजेच सुषुम्णेत प्रवेश करतो असे हठयोगप्रदीपिकेत सांगितले आहे. *पूरकांते तु कर्तव्यो बंधो जालंधराभिधः। कुंभकान्ते रेचकादौ कर्तव्यस्तूड्डियानकः।। अधस्तात्कुंचनेनाशु कंठसंकोचने कृते । मध्ये पश्चिमतानेन स्यात्प्राणो ब्रह्मनाडिगः।।* (हठयोगप्रदीपिका २।४५-४६)

या तीन बंधांचे फळ **कुंडलिनी शक्तीचे जागरण** हे आहे. ब्रह्मनाडीत प्राणाचा प्रवेश त्याचाच संकेत देते. हठयोगप्रदीपिकेत याचे असे वर्णन आहे. *अपाने ऊर्ध्वगे जाते प्रयाते वन्हिमण्डलम्। तदाऽनलशिखा दीर्घा जायते वायुनाऽऽहता।।६६।। ततो यातो वन्ह्यपानौ प्राणमुष्णस्वरूपकम्। तेनात्यन्तप्रदीप्तस्तु ज्वलनो देहजस्थता।।६७।। तेन*

**समासीनो यतास्योऽन्तः-प्राणं दक्षिणया त्यजेत् । सारं लगति हृत्कण्ठ-कपोलावध्यसौ यथा ।।१६।।**
**लोहकारस्य भस्रावच्छक्त्याश्वापूर्य रेचयेत् । वामां मध्यानामिकाभ्यां धृत्वा जाते श्रमे विधेः ।।१७।।**
**पीत्वा प्राणं कुम्भयित्वा धृत्वाङ्गुष्ठेन दक्षिणम् । वामया रेचयेन्मन्दं तथाथ प्राग्वदाचरेत् ।।१८।।**
**द्विनाड्यभ्यासाद्यामार्धं शक्तिर्मार्गं ददात्यरम् । भस्रेयं सर्वदोषघ्नी रुक्पापघ्न्यपि सिद्धिदा ।।१९।।**

सं+आसीनः यत+आस्यः अन्तः+प्राणं दक्षिणया स+आरं त्यजेत् यथा असौ हृत्+कण्ठ+कपोल+अवधि लगति।१६। लोहकारस्य भस्रावत् शक्त्या आशु आपूर्य वामां मध्य+अनामिकाभ्यां धृत्वा रेचयेत्। विधेः श्रमे जाते..।१७। प्राणं पीत्वा अङ्गुष्ठेन दक्षिणं धृत्वा वामया मन्दं रेचयेत्। तथा अथ प्राक्+वत् आचरेत्।१८। द्वि+नाडी+अभ्यासात् शक्तिः अरं मार्गं ददाति। इयं भस्रा सर्व+दोष+घ्नी, रुक्+पाप+घ्नी अपि सिद्धि+दा।१९।

*कुण्डलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते। दण्डाहता भुजङ्गीव निःश्वस्य ऋजुतां व्रजेत्।।६८।। बिलं प्रविष्टेव ततो ब्रह्मनाड्यन्तरं व्रजेत्। तस्मान्नित्यं मूलबंधः कर्तव्यो योगाभिः सदा।।६९।।* (ह.यो.प्र. ३). मूलबंधाच्या अभ्यासाने ऊर्ध्वगामी झालेला अपानवायू वह्निमंडलात (मणिपूर चक्रांत) प्रविष्ट झाला की वायूने प्रेरित होऊन एक उंच अग्निशिखा निर्माण होते आणि देहस्थ अग्नी अत्यंत प्रदीप्त होतो. त्याने तापलेली कुंडलिनी जागते आणि आपली वक्रता सोडून काठीने मारलेल्या नागिणीसारखी सरळ आणि ताठ होते. मग सुषुम्णेच्या मुखात शिरून ब्रह्मनाडीत जाते.

**भस्त्रिका -** प्रथम समस्थितीत बसावे. समस्थिती म्हणजे सरळ पण ताणरहित. तोंड बंद करावे आणि फुप्फुसातला प्राणवायु हृदय, कंठ आणि गालाला लगटून लोहाराच्या भात्यासारखा आवाज करीत बाहेर सोडावा (रेचक करावा).१६. डावी नाकपुडी मधले बोट आणि अनामिका यांनी दाबून बंद करून उजव्या नाकपुडीने वायू वेगाने आवाज करीत आत घेऊन (पूरक), कुंभक न करता त्याच नाकपुडीने पुन्हा बाहेर सोडावा. असे भराभर पूरक व रेचक केल्यावर श्रम झाल्यावर(१७) पूरक करून अंगठ्याने उजवी नाकपुडी बंद करून डाव्या नाकपुडीने हळूहळू रेचक करावा. मग आधीच्यासारखेच भात्यासारखा आवाज करीत वेगाने रेचक आणि पूरक डाव्या नाकपुडीने करावेत.१८. दोन्ही नाड्यांनी

**शिश्ननाभ्यन्तस्थकन्दं सति वज्रासने पदौ । धृत्वा दृढं प्रपीड्यारं भस्रां सिद्धासनस्थितः ॥२०॥**
**समाकुञ्चितनाभिर्द्राक् कुर्याच्छक्तिश्चलत्यतः । यामार्धाभ्यासतो धैर्यान्मध्यनाड्यां समुद्गता ॥२१॥**
**ऊर्ध्वाकृष्टा भवेत्किञ्चिच्छक्तिर्नाडीमुखं त्यजेत् । ततः स्वतो व्रजत्यूर्ध्वं प्राणोऽतस्तां विचालयेत् ॥२२॥**
**चालनात्सर्वसिद्ध्याप्तिर्-मण्डलाद्योगिनो न तु । रुग्भ्यो भयं यमाच्चापि नेतोऽन्यन्नाडिशोधनम् ॥२३॥**

वज्र+आसने सति पदौ दृढं धृत्वा शिश्न+नाभि+अन्तस्थ+कन्दं प्रपीड्य सिद्धासन+स्थितः..।२०। सं+आकुंचित+नाभिः द्राक् भस्रां कुर्यात्। अतः शक्तिः चलति। धैर्यात् याम+अर्ध+अभ्यासतः मध्यनाड्यां समुद्गता..।२१। शक्तिः किञ्चित् ऊर्ध्व+आकृष्टा भवेत्, नाडी+मुखं त्यजेत्। ततः प्राणः स्वतः ऊर्ध्वं व्रजति। अतः तां विचालयेत्।२२। चालनात् मण्डलात् योगिनः सर्व+सिद्धि+आप्तिः, रुक्+भ्यो भयं न, यमात् अपि च (च)। इतः अन्यत् नाडि+शोधनं न।२३।

(नाकपुड्यांनी) मिळून भस्रिकेचा अभ्यास अर्धा प्रहर (दीड तास) केल्यावर शक्ती (प्राणाला) शीघ्र (पश्चिम) मार्ग देते. म्हणजे कुंडलिनीचा सुषुम्णेत प्रवेश करून देते. ह्या भस्रिकेच्या अभ्यासाने कफादि दोष, रोग आणि पाप यांचा नाश होतो.१९. हठयोगप्रदीपिकेत (२:४४) आठ प्रकारचे कुंभक सांगितलेले आहेत. सूर्यभदेन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्रिका, भ्रामरी, मूर्छा आणि प्लावनी (*सूर्यभेदनमुज्जायी सीत्कारी शीतली तथा। भस्रिका भ्रामरी मूर्छा प्लावनीत्यष्ट कुंभकाः॥२:४४॥*). इथे श्रीस्वामिमहाराजांनी विशेष महत्त्वाच्या भस्रिकेचेच मुख्यतः वर्णन केले आहे.

**शक्तिचालन -** शिश्न आणि नाभी यांच्यामध्ये नऊ अंगुळे (बोटे) लांबीचा अंडाकार कंद असतो. त्याच्यापासून शरीराच्या ७२ हजार नाड्या उगम पावतात. '*ऊर्ध्वं मेंढ्रादधो नाभेः कंदयोनिः खगांडवत्। तत्र नाड्यः समुत्पन्नाः सहस्त्राणां द्विसप्ततिः॥*' (गोरक्षनाथ). त्यांपैकी मुख्य नाडी सुषुम्णा आहे. तिचे मुख कुंडलिनी शक्तीने अडवलेले असते. तिला विचलित करणे हा कंदताडनाचा उद्देश्य आहे. वज्रासनावर बसून दोन्ही पाय घट्ट धरून दोन्ही टाचांनी त्या कंदाला ताडन करावे.२०. नंतर पुनश्च सिद्धासन घालून गुरूंकडून समजून घेतलेल्या परिधानयुक्तीने बेंबीचे

**चालितायामपि प्राणो बद्धा चेद्रसना सुखम् । व्रजत्यूर्ध्वं सिद्धिपूर्वं राजयोगपदप्रदः ।।२४।।**
**जिह्वां मूलशिरां छित्वा रोममात्रं प्रघर्षयेत् । पथ्यासैन्धवचूर्णैर्गां प्राग्वत्सप्तदिनैर्मुहुः ।।२५।।**
**षण्मासादिति जिह्वाधः शिराबन्धो विनश्यति । मुद्रा स्यात् खेचरी त्र्यध्वे योजिताऽवाङ्मुखी कला ।।२६।।**
**सहृज्जिह्वा चरत्यस्य खे कदापि स्पृशन्ति नो । विषार्तिरुग्जराक्षुत्तृण्निद्रातन्द्रामृतिक्रियाः ।।२७।।**
**स्त्र्याश्लेषितस्यापि बिन्दुर् न क्षरत्यूर्ध्वमेति सः । चलितश्चेद्योनिमुद्रा-बद्धो मुक्तः स भोग्यपि ।।२८।।**

(शक्तेः) चालितायां अपि रसना बद्धा चेत् राजयोगप्रदः प्राणः सुखं सिद्धि+पूर्वं ऊर्ध्वं व्रजति।२४। जिह्वां मूल+शिरां छित्वा गां पथ्या+सैंधव+चूर्णैः रोम+मात्रं प्रघर्षयेत्। मुहु सप्त+दिनैः प्राक्+वत्।२५। इति षण्+मासात् जिह्वा+अधः शिरा+बन्धः विनश्यति।२६। अवाक्+मुखी कला त्रि+अध्वे योजिता खेचरी मुद्रा स्यात्।२६। अस्य जिह्वा सहृत् खे चरति। विष+आर्ति+रुक्+जरा+क्षुत्+तृट्+निद्रा+तंद्रा+मृति+क्रियाः कदा अपि नो स्पृशन्ति।२७। स्त्री+आश्लेषितस्य अपि बिन्दुः न क्षरति, सः ऊर्ध्वं एति। चलितः चेत् योनि+मुद्रा+बद्धः सः भोगी अपि मुक्तः।२८।

आकुंचन करून लगेच भस्त्रा करावी. याने कुंडलिनी शक्ती विचलित होते. धैर्याने अर्धा प्रहर अभ्यास केल्यावर सुषुम्णेत प्रवेशलेली(२१) शक्ती थोडीशी वर खेचली जाते आणि सुषुम्णेचे मुख सोडून प्राणाला वाट करून देते. मग प्राण आपोआपच वर ब्रह्मरंध्राकडे जाऊ लागतो. याकरिता शक्तीला विचलित करायला पाहिजे.२२. शक्तिचालनाच्या अभ्यासाने एका मंडलात (४० दिवस) योग्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. रोगाचेच काय, पण मृत्यूचेही भय उरत नाही. शक्तिचालनासारखा दुसरा नाडीशुद्धीचा उपाय नाही. शक्तिचालनाला कुंडलिनीचे जागरण असेही म्हणतात.२३.

शक्तीचे चालन झाल्यावर ती सुषुम्णेतून वर चढवायची असते. जिह्वा जर खेचरी मुद्रेने बांधली तर शक्ती अधिक सुखाने ब्रह्मरंध्राकडे जाते. प्राणाची गती सहस्रार चक्राकडे झाली की राजयोग सिद्ध होतो आणि साधकाला अणिमादि सिद्धींची प्राप्ती होते.२४. ही खेचरी मुद्रा सिद्ध करण्यासाठी प्रथम जीभेच्या मुळाशी असलेली शीर कापून ती मोकळी

**सुधान्तःस्रवतीन्दोस्तां ग्रसत्यर्कस्ततो जरा । अधःशीर्षोर्ध्वपात्तिष्ठेद् बह्वाहारः शनैः शनैः ।।२९।।**
**याममात्रं ततः सिद्धिर्व्यस्तेयं करणीष्टदा । वलीपलितवेपघ्नी मृत्युहर्त्री सुधाप्रदा ।।३०।।**

इन्दोः सुधा अन्तः स्रवति। तां अर्कः ग्रसति। ततः जरा। अधः+शीर्षः ऊर्ध्व+पात् तिष्ठेत्। शनैः शनैः बहु+आहारः।२९। ततः याम+मात्रं सिद्धिः। इयं इष्ट+दा वली+पलित+वेप+घ्नी मृत्यु+हर्त्री सुधाप्रदा व्यस्ता करणी।३०।

करायला हवी. हे छेदन अगदी काळजीपूर्वक थोडे थोडे करावे लागते. प्रथम ती शीर निवडुंगाच्या पानासारख्या शस्त्राने अगदी केसभर कापावी आणि हिरडा आणि शेंदीलोण यांचे मिश्रण तिथे चोळावे. यानंतर जीभ शिरेपासून सोडविण्यासाठी आणि लांब करण्यासाठी तिचे चालन आणि दोहन करावे. म्हणजे ती दोन्ही हातांचे अंगठे आणि बोटांनी धरून पुढे-मागे आणि डावी-उजवीकडे ओढून लांबवावी आणि शिरेपासून सुटी करावी. सात दिवसांनी पुन्हा तशीच केसभर कापून पूर्वीप्रमाणेच दोहन-चालनादि करावेत.२५. अशा रीतीने अभ्यास केल्याने सहा महिन्यांत जिभेच्या..

..खालचा शिराबंध पूर्ण सुटतो. तसेच जीभेची लांबी इतकी होते की ती बाहेर काढून तिचा शेंडा भ्रूमध्याला लावता येतो. आता ही जीभ उलटी फिरवून पडजिभेच्या वरच्या छिद्रांतून भ्रूमध्याच्या आतल्या भागाला टेकवली की खेचरी मुद्रा सिद्ध होते.२६. ह्या मुद्रेत साधकाची जिह्वा मनासह आकाशांत जाते (*खे चरति*) म्हणून तिला खेचरी म्हणतात. हिचे फळ असे आहे की त्या योग्याला विषबाधा, रोग, वार्धक्य, तहान, भूक, निद्रा, तंद्रा, मृत्यू कधीही स्पर्श करीत नाहीत.२७. अशा योग्याचे वीर्य स्त्रीच्या आलिंगनानेही स्खलित होत नाही. आणि स्खलन झाले तरीही तो योनी (वज्रोली) मुद्रेच्या अभ्यासाने वर खेचू शकतो. योगशास्त्राच्या सिद्धांतानुसार हे वर ओढलेले शुक्ल वीर्य शिवणीच्या आंतल्या योनिस्थानांतील पोवळ्यासारख्या रक्त वीर्याशी संयुक्त होते आणि त्याचे ओजात रूपांतर होऊन ते सुषुम्णेतून सहस्रार चक्राकडे जाते. असा योगी भोगी असला तरी तो मुक्तच असतो.२८.

**स्वास्येऽग्नौ दीप्तेऽङ्गसादे नाडीशुद्धावनामये । नादस्फुटत्वे सुदृष्ट्याः सिद्धिर्बिन्दौ जिते सति ॥३१॥**
**विविधा उपसर्गाः प्राक् संभवन्त्यत्र योगिनः । सद्गुरोर्दृढभक्त्या ते प्रणश्यन्ति न चान्यथा ॥३२॥**
**कारणं कर्मारुरुक्षोर्योगिनो योगमुत्तमम् । शमः कारणमस्याग्रे योगारूढस्य योगिनः ॥३३॥**
**कामवेगसहोऽन्तर्दृक् सुखारामोऽभितो यतिः । ब्रह्मनिर्वाणमेत्येव ब्रह्मभूतोऽमलः समः ॥३४॥**

सु+आस्ये, अग्नौ दीप्ते, अङ्गसादे, नाडी+शुद्धौ, अनामये, नाद+स्फुटत्वे, सु+दृष्ट्या, बिन्दौ जिते सति सिद्धिः।३१। प्राक् योगिनः विविधा उपसर्गाः संभवन्ति। ते सत्+गुरोः दृढ+भक्त्या प्रणश्यन्ति। अन्यथा च न।३२। उत्तमं योगं आरुरुक्षोः योगिनः कर्म कारणम्। अस्य योग+आरूढस्य योगिनः अग्रे शमः कारणम्।३३। काम+वेग+सहः अन्तः+दृक् अभितः सुख+आरामः ब्रह्मभूतः समः यतिः ब्रह्म+निर्वाणं एति एव।३४।

टाळूच्या आतील चंद्रापासून अमृतस्राव होत असतो. पण बेंबीच्या आतील सूर्य ते खाऊन टाकतो. हेच वार्धक्याचे कारण आहे. या अमृताचेच पान खेचरी मुद्रेने योगी करत असतो. हे अमृत सूर्यापासून राखून पान करण्यासाठी खाली डोके आणि वर पाय अशा स्थितीत राहावे. याने हळूहळू आहार वाढत जातो. म्हणून या मुद्रेचा अभ्यास करताना आहार भरपूर घ्यावा. आरंभी क्षणभर अभ्यास करून तो हळूहळू वाढवीत एक प्रहर (तीन तास) झाला की ही विपरीतकरणी मुद्रा सिद्ध होते. अमृताचा लाभ करून देऊन, अंगावर सुरुकत्या, अकाली केस पांढरे होणे, कंप यांना दूर करून ही मृत्यूला दूर करणारी आहे.२९.

इथे हठयोगाचे निरूपण पूर्ण होते. त्या योगाचे फळ या श्लोकात सांगितले आहे. कांतियुक्त मुख, जठराग्नीचे प्रदीपन, शरीराचे कार्श्य, नाड्यांची शुद्धी, निरोगता, अनाहत नादाचे प्राकट्य, निर्दोष दृष्टी आणि बिंदुजय ही हठयोगाच्या सिद्धीची आठ लक्षणे जाणावीत.३१. पण या सिद्धीच्या मार्गात अनेक विघ्ने आहेत ही सावधानतेची सूचना श्रीस्वामिमहाराज करीत आहेत. पतंजलींनी योगसूत्रांत (१:३०) व्याधि, स्त्यान, आलस्य, अविरति, भ्रान्तिदर्शन,

**कश्चिद्धारणयोपास्ते ध्यानात्कश्चित् समाधिना । आत्मानमेवमाप्त्वेमां सिद्धिं मुक्तो भवत्यसौ ।।३५।।**
**हृद्युपास्यो धारणया वराभयकरो हरिः । प्रादेशमात्रः सुसिद्धः खेचरीमुद्रया युतः ।।३६।।**
**अङ्गुष्ठमात्रं पुरुषं दत्तात्रेयं दिगम्बरम् । ध्यायेत्सिद्धासनासीनं द्युनिशं कण्ठसंस्थितम् ।।३७।।**

कश्चित् धारणया उपास्ते, (कश्चित्) ध्यानात् (उपास्ते), कश्चित् समाधिना (उपास्ते)।३५। प्रादेश+मात्रः वर+अभय+करः सुसिद्धः खेचरी+मुद्रया युतः हरिः हृदि धारणया उपास्यः।३६। अङ्गुष्ठ+मात्रं दिगंबरम् सिद्ध+आसीनं पुरुषं दत्तात्रेयं कण्ठ+संस्थितं द्यु+निशं ध्यायेत्।३७।

अलब्धभूमिकत्व इत्यादि अंतराय सांगितले आहेत. योगशास्त्रातील ग्रंथांत आणि मार्कंडेयादि पुराणांतही त्यांचे सविस्तर वर्णन आहे. श्रीमहाराजांच्या मते ह्या सर्व विघ्नांवर सद्गुरूंची दृढ भक्ती हाच एकमेव उपाय आहे. पतंजलींनीही सर्व गुरूंचाही गुरू जो परमेश्वर, त्याच्या वाचकाच्या - प्रणवाच्या किंवा नामाच्या जपाने अंतरायांचा अभाव होतो (१:२९) असे सांगितले आहे.३२. तेहतिसावा श्लोक भगवद्गीतेतील श्लोकाचा (६:३) अनुवादच आहे. योगाची सिद्धी पावण्यासाठी कर्म हेच साधन आहे. योग सिद्ध झाल्यावर त्या योग्याने कर्माचा त्याग करून - संन्यास घेऊन शमदमादींचा - उपलक्षणाने ज्ञानयोगाचा, अभ्यास करावा. असा थोडक्यात अभिप्राय आहे. श्रीमच्छंकराचार्यांनी या..

..श्लोकाच्या टीकेत स्पष्ट केल्याप्रमाणे, निष्काम कर्मयोग हे ध्यानयोगाचे साधन आहे असे म्हटले आहे. आतापर्यंत पाहिलेला हठयोग हा कर्मयोगातच अंतर्भूत आहे. कर्मयोगाने शुद्ध झालेले चित्त समाधानरूपी योगात स्थिरावते. ते चित्त जसे जसे स्थिर होईल तसा तसा योगी कर्मापासून निवृत्त होत जाईल.३३.

**प्रत्याहार - अन्तर्दृक्** म्हणजे ज्याची दृष्टी आदि इन्द्रिये बाह्य विषयाना सोडून आत वळली आहेत. ज्याची इंद्रिये कासवाच्या अवयवांप्रमाणे विषयांपासून आत ओढली जातात त्याची प्रज्ञा स्थिर होते, असे भगवद्गीतेत प्रत्याहाराचे (२:५८) वर्णन आहे.

**सहस्रदलपद्मस्थं सुसूक्ष्मं शान्तमुज्ज्वलम् । समाधिना द्वादशाहं तन्मयो भावयेत्परम् ।।३८।।**

सहस्र+दल+पद्म+स्थं शांतं उज्ज्वलं सुसूक्ष्मं परं तत्+मयः समाधिना द्वादश+अहं भावयेत्।३८।

त्यामुळेच तो कामाचा वेग सहन करू शकतो. भगवद्गीतेत (५:२३) सांगितल्याप्रमाणे जिवंतपणीच कामक्रोधांचे वेग सहन करणाराच योगी व सुखी होतो. तसेच बुद्धिग्राह्य अतींद्रिय सुखांत (६:२१) तो रमलेला असतो. 'मग जे जे कां निमिख। देखेल माझे सुख। तेतुलेनि अरोचक। विषयीं घेईल।।१२:१०६।।' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे प्रत्याहार आणि आंतरिक सुख आणि हे परस्परसंवर्धक आहेत. या अभ्यासानेच योगी चित्ताचे सर्व मल दूर करून ब्रह्मरूप होऊन ब्रह्मनिर्वाण पावतो. तो सम म्हणजे सुदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जातो. **यतिः** या शब्दाने ही अवस्था दुर्लभ आहे.३४.

कुणी धारणेच्या अभ्यासाने, कुणी ध्यानाने तर कुणा समाधीने आत्म्याची उपासना करतात आणि ही सिद्धी प्राप्त करून मुक्त होतात. आता पुढील एकेका श्लोकाने धारणा, ध्यान आणि समाधी ह्यांचे वर्णन केले आहे.३५.

**धारणा -** पतंजलींच्या मते (३:१) मनाला एका देशात बांधणे म्हणजे धारणा (*देशबन्धश्चित्तस्य धारणा।*). बाहेरच्या किंवा शरीरांतर्गत आलंबनावर चित्त स्थिर करून ठेणे हे धारणेचे लक्षण आहे. गरुडपुराणात धारणेला उपयुक्त असे दहा देश सांगितले आहेत. नाभी, हृदय, छाती, गळा, तोंड, नेत्र, भ्रूमध्य, टाळू आणि त्याच्या थोडा वरचा देश. विष्णुपुराणात भगवंताच्या सगुण मूर्तीवरही धारणा करता येते. '*मूर्तं भगवतो रूपं सर्वोपाश्रयनिःस्पृहम्। एषा वै धारणा ज्ञेया यच्चित्तं तत्र धार्यते।।*' या श्लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी हृदयाच्या देशात, अनाहत चक्रात, एक वीतभर उंचीच्या वर आणि अभय मुद्रा दाखविणाऱ्या, खेचरी मुद्रेने युक्त अशा पापतापहर दत्तप्रभूंची धारणा करायला सांगितली आहे. ही धारणा अशी केली पाहिजे की संसारांतील कर्तव्ये करतांनाही चित्त तिथून ढळायला नको. धारणेची एक व्याख्या अशी आहे की वृत्ती त्यांत ध्येयाकार होते; पण त्यांत इतर वृत्ती आणि व्यवधान येत राहते. म्हणजेच धारणेतील चित्ताची एकाग्रता ही विच्छिन्न असते.३६.

**अन्तर्लीनसहृत्प्राणो पश्यन्नचलदृग्बहिः । मुद्रेयं शाम्भवी शून्याशून्यलक्ष्मपदप्रदा ।।३९।।**

अचल+दृक् बहिः पश्यन् अन्तः+लीन+सहृत्+प्राणः। इयं शून्य+अशून्य+लक्ष्म+प्रदा शाम्भवी मुद्रा।३९।

**ध्यान -** पुढच्या श्लोकांत ध्यान सांगितले आहे. पतंजलींनी म्हटले आहे, '*तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्।*' ध्यानात ध्येयाकार झालेली वृत्ती अविच्छिन्न आहे. चित्त अखंड तेलाच्या धारेसारखे ध्येयाकडे प्रवाहित होणे, त्यात कसलीही दुसरी वृत्ती न उठणे हे ध्यानाचे लक्षण आहे. इथे श्रीस्वामिमहाराजांनी कंठामध्ये अंगठ्याएवढ्या, सिद्धासनस्थ, दिगंबर पुरुषाचे ध्यान करायला सांगितले आहे. चित्त एक दिवस व एक रात्र (२४ तास) असे स्थिर झाले की ध्यान सिद्ध होते. मागच्या श्लोकांत वीतभर मूर्तीचे ध्यान सांगितले. आता अंगठाभर रूपाचे सांगत आहेत. याचाच अर्थ आलंबन अधिकाधिक सूक्ष्म करायचे आहे.३७.

**समाधी -** ध्यान सिद्ध झाले की समाधीचा अभ्यास करावा. समाधीचा विषय अत्यंत सूक्ष्म, शांत, तेजोमय भगवत्स्वरूप असून स्थान ब्रह्मरंध्रातील सहस्रदलपद्म आहे. ध्यान जेव्हा इतके प्रगाढ होते की योग्याची जाणीव नाहीशी होते. फक्त ध्येयाचेच भान शिल्लक राहते. *तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः।* (योगसूत्र ३:३). समाधीचा काळ बारा दिवसांचा आहे. *अवध्यः सर्वशस्त्राणामशक्यः सर्वदेहिनाम्। अग्राह्यो मंत्रयंत्राणां योगी मुक्तः समाधिना।।* (हठयोगप्रदीपिका ४:११३) समाधी सिद्ध झालेल्या योग्याचा कोणत्याही शस्त्राने वध होत नाही; कुणाही देहधारी जीवाकडून त्याचा पराभव होऊ शकत नाही. मंत्र किंवा यंत्रांचा त्याच्यावर प्रभाव पडत नाही.३८.

**शांभवी मुद्रा -** प्राण आणि मन अंतराकाशांत लीन असतांना निमेषोन्मेषरहित उघडे डोळे मात्र कांहीच न पाहता बाहेर लागलेले आहेत. अशी शून्य आणि अशून्य परमात्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारी शांभवी मुद्रा आहे. **शं** म्हणजे सुख ज्या मुद्रेने होते **भ**वति ती **शांभवी**. **मुत्** अर्थात् निर्विकल्प आनंद - **रा**ति - देणारी, ती **मुद्रा**.

**तद्वान् दृढासनो दक्ष-कर्णे रुद्धबिलो ध्वनिम् । त्रिग्रन्थिभेदं शृणुयात् सुसूक्ष्मं स समाधिभाक् ।।४०।।**
**यमेन दशधा नूनं दशधा नियमेन च । आसनाद्येन षट्केन योगोऽष्टाङ्गोऽयमुच्यते ।।४१।।**

तत्+वान् दृढ+आसनः रुद्ध+बिलः त्रि+ग्रन्थि+भेदं सुसूक्ष्मं ध्वनिं शृणुयात्। सः समाधि+भाक्।४०। दशधा यमेन, दशधा नियमेन च, एन आसनादि षट्केन नूनं अयं अष्ट+अङ्गः योगः उच्यते।४१।

**शून्य** म्हणजे देहादि उपाधिरहित; आणि **अशून्य** म्हणजे निषेधाच्याही अतीत ह्या लक्षणांचे योग्यांनाच गमणारे (*गम्यते अनेन*) **पद** पावविणारी ही मुद्रा आहे. हठयोगप्रदीपिकेत हिचे असे वर्णन आहे, '*अंतर्लक्ष्यं बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता। एषा सा शांभवीमुद्रा वेदशास्त्रेषु गोपिता।।*' (४।३६) भ.पू.पा. शंकराचार्य योगतारावलीत म्हणतात. *नेत्रे ययोन्मेषनिमेषशून्ये वायुर्यया वर्जितरेचपूरः। मनश्च संकल्पविकल्पशून्यं मनोन्मनी सा मयि सन्निधत्ताम*।।१७।।. या श्लोकात या मुद्रेला मनोन्मनी आणि पुढे २१व्या श्लोकात अमनस्क मुद्रा असे तिलाच म्हणले आहे.३९.

**नादानुसंधान -** ही शांभवी मुद्रा लावून दृढ आसनावर बसून, दोन्ही अंगठ्यांनी कान, तर्जनींनी डोळे, मधल्या बोटांनी आणि उरलेल्या बोटांनी तोंड ही बिळे बंद केल्याने, उजव्या कानात नाद ऐकायला येतात. त्यांवर लक्ष केंद्रित केल्याने समाधीचा लाभ होतो. या नादांच्या *आरंभ*, घट, परिचय आणि निष्पत्ती अशा चार अवस्था हठयोगप्रदीपिकेच्या ४थ्या उपदेशात सांगितल्या आहेत. येथे श्रीस्वामिमहाराजांनी त्याचाच निर्देश केला आहे.

**त्रिग्रंथिभेदं -** प्रथम अनाहत चक्रातील रजोगुणात्मक ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हा सुषुम्णेत भूषणांच्या रुणझुणीसारखे नाद ऐकायला येतात. ही आरंभ अवस्था होय. या अवस्थेत कामक्रोधादि राजस भावांचा उपशम होतो. योग्याचे साधन प्रगत झाल्यावर जेव्हा प्राण कंठातील **विष्णुग्रंथी**चा भेद करतो तेव्हा भेरीसारखा आवाज उजव्या कानात ऐकायला येतो. हीच *घटावस्था.* यानंतर प्राण भ्रूमध्यात स्थिरावून तेथील रुद्रग्रंथीचा भेद करतो तेव्हा विशिष्ट वाद्याचा

**एतेनाष्टाङ्गयोगेन प्रबुद्धः स्वल्पसंविदा । शुभाशुभविनिर्मुक्तो देही ब्रह्ममयो भवेत् ।।४२।।**

एतेन स्वल्प+संविदा अष्ट+अङ्ग+योगेन प्रबुद्धः शुभ+अशुभ+विनर्मुक्तः देही ब्रह्म+मयः भवेत्।४२।

ध्वनी ऐकायला येतो. मग चित्तवृत्तीरूप आनंद मावळून स्वाभाविक आत्मानंद प्रकट होतो. ही तिसरी *परिचयावस्था*. तो या अवस्थेत योगी भूक, तहान, झोप, त्रिदोषजन्य दुःखे यांपासून मुक्त होतो. चौथ्या *निष्पत्ती* अवस्थेत प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिर होतो आणि बासरीच्या आवाजासारखा नाद उजव्या कानात ऐकायला येतो. हीच निष्पत्ती अवस्था. ह्यालाच राजयोग असे म्हणतात. या अवस्थेला पोचलेल्या योग्याला जगाची उत्पत्ती आणि लय करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. भ.पू.पा. शंकराचार्यांनी नादानुसंधानाने होणाऱ्या चित्ताच्या लयाला सर्वश्रेष्ठ लय मानले आहे. (*सदाशिवोक्तानि सपादलक्षलयावधानानि वसन्ति लोके। नादानुसंधानसमाधिमेकं मन्यामहे मान्यतमं लयानाम्।* योगतारावली ४)४०.

**अष्टांगयोग -** आतांपर्यंतच्या विवेचनांत श्रीमहाराजांनी आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही सहाच अंगे (**षट्क**) सांगितली आहेत. आता आणखी दोन अंगांचा विचार करून अष्टांगयोग संपूर्ण केला आहे. दहा प्रकारचा यम आणि दहा प्रकारचे नियम ही ती दोन अंगे. योगशास्त्रानुसार ते पुढीलप्रमाणे आहेत.

*अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः। दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश।*
*तपः संतोष आस्तिक्यं दानमीश्वरपूजनम्। सिद्धांतवाक्यश्रवणम् ह्रीमती च तपो हुतम्।*
*नियमा दश संप्रोक्ता योगशास्त्रविशारदैः।।*

पातंजल योगसूत्रात यम आणि नियम प्रत्येकी पाचच सांगितले आहेत. शांडिल्यादि इतर योगशास्त्रकारांनी आणि पुराणातही त्यांची संख्या वरीलप्रमाणे दहा दहा सांगितली आहे. यम हे दोषांपासून दूर राहण्यासाठी आहेत तर नियम हे गुणरूप आहेत. हे सामान्य मानव धर्माचे अंगभूत असल्याने कुणी कुणी यांना योगाची अंगे न मानता योगाला षडंगच म्हणतात.

**इदं रहस्यं परमं नाख्येयं यस्य कस्यचित् ।।४३।।**

**।। इति योगाख्यं प्रथमं रहस्यम् ।।**

इदं परमं रहस्यम्। यस्य कस्यचित् न आख्येयम्।४३।

अर्थात् हे यमनियम योगाभ्यासाचा पायाच आहेत. योगाच्या सिद्धीनंतरही लोकसंग्रहासाठी यांचे अनुष्ठान आवश्यकच ठरते.४१. या स्वल्प म्हणजे सूक्ष्मस्वरूप परमेश्वराचे ज्ञान करून देणाऱ्या अष्टांगयोगाने ऐतरेय उपनिषदांत (१:३:१३) सांगितल्याप्रमाणे 'तोच हा पुरुष, ब्रह्म जीवमात्रांत व्याप्त आहे.' अशा ज्ञानाने प्रबुद्ध झालेला जीव शुभ आणि शुभ यांच्यापासून मुक्त होऊन ब्रह्मरूप होतो.४२.

**रहस्य -** ह्या अर्ध्या श्लोकात ग्रंथकारांनी हे रहस्य आहे आणि अनधिकारी माणसाला सांगू नये. असा आदेश दिला आहे. भगवद्गीतेतही (१८:६४) 'अर्जुना हे सर्व गुह्यांत गुह्यतम मी तुला सांगतो आहे.' असे स्पष्ट करून ते 'कधीही तपरहित, भक्तिहीन, सेवापराङ्मुख आणि परमेश्वराविषयी दोषदृष्टी ठेवणाऱ्याला सांगू नये' (६७) असा दंडक घातला आहे. हे सर्वच आध्यात्मिक ग्रंथांना लागू आहेच. इथे आणखी एक सूचना पुनरुक्तीचा दोष घेऊन करावीशी वाटते की हा ग्रंथ जिज्ञासूंना योगाची अंशतः तरी माहिती व्हावी या लोककल्याणाच्या भावनेने केला आहे. ह्यांत योगाची अनेक रहस्ये गुप्तच ठेवण्यात आलेली आहेत.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील योगरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ बोधरहस्यम् ।।

**सन्तप्त धन्य संन्यासिन् गुरुभक्त गतागतात् । मुक्त्या आत्माप्तये तत्त्व-जडचैतन्यविद्भव ।।१।।**

संतप्त धन्य संन्यासिन् गुरु+भक्त गत+आगतात् आत्म+आप्तये मुक्त्यै तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव।१।

श्रीगणेशाय नमः। कठोपनिषदांत (२:१:१) इंद्रिये बहिर्गामी असल्याने ती अंतरात्म्याला पाहू शकत नाहीत; त्यासाठी त्यांना आत वळवून मोक्षाच्या इच्छेने प्रत्यगात्म्याला एकादाच धीर पुरुष पाहतो (*कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्*). याचे दिग्दर्शन योगरहस्यात करून आता तिथेच (१:२:९) पुढे सांगितलेल्या 'ते दुसऱ्याकडूनच जाणून चांगले समजते' (*प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ*) या श्रुतिवाक्याचा भावार्थ व्यक्त करण्यासाठी हे बोधरहस्य केले आहे. योगरहस्यात सांगितल्याप्रमाणे योगाने मन-पवनांना स्थिर केल्यावर करावयाचा चित्ताच्या उपशमाचा, म्हणजेच आत्मज्ञानाचा अभ्यास बोधरहस्यात सांगितला आहे. बोध म्हणजेच ज्ञान आणि ज्ञानानेच मोक्ष म्हणजे निरतिशय आनंद - ज्यात सर्व दुःखांचा आत्यंतिक निरास अंतर्भूत आहे. हा सूत्रात्मक ग्रंथ श्रीस्वामिमहाराजांनी गुरु-शिष्यसंवादाच्या रूपात मांडलेला आहे. संवादात गुरुमहाराजच सांगत आहेत. शिष्याचे प्रश्न अपेक्षित किंवा अध्याहृत आहेत.

कुणी एक सुसंस्कृत ब्राह्मण वेदाध्ययन करून, गृहस्थाश्रमात विहित कर्मांचे आचरण करून आपल्या चित्तातील मलांचा निरास करून, परमेश्वराची उपासनाही करून दैवयोगाने त्रिविध तापांनी **संतप्त** होऊन वैराग्याने श्रीगुरूंना शरण आला. त्याची ती अवस्था पाहून कृपाळू भगवान् श्रीगुरू त्याला विचारीत आहेत.

**अधिकार -** पहिल्या श्लोकात शिष्याला उद्देशून चार संबोधने आहेत. त्या संबोधनांतून हा बोध घेण्याला शिष्य कसा योग्य आहे ते स्पष्ट होते. पहिले संबोधन आहे, '**संतप्त**'! म्हणजेच संसारांतल्या आध्यात्मिक, आधिभौतिक

आणि आधिदैविक अशा तीन प्रकारच्या तापांनी होरपळलेला! (आध्यात्मिक म्हणजे स्थूल शरीरातच निर्माण होणारी व्याध्यादि पीडा, व सूक्ष्म शरीरात होणारी दंभ-मद-मानादि आंतरपीडा, आधिभौतिक म्हणजे स्वशरीराहून भिन्न असणाऱ्या, प्रत्यक्ष परिदृश्यमानच चराचर जगापासून होणारी पीडा व आधिदैविक म्हणजे चर्मचक्षूला अदृश्य असणाऱ्या भूतप्रेतपिशाच प्रभृति शक्तींपासून होणारी पीडा.) अर्थातच ह्या संसाराच्या दुःखमयतेची खात्री पटलेला आणि त्यामुळे संसाराला उबगलेला. संसारातील सुखे कशी फसवी, क्षणभंगुर आणि दुःखपर्यवसायी आहेत हे मनांत बिंबल्याने ऐहिक किंवा पारलौकिक अशा सर्व सुखांच्या भोगांचा तिटकारा म्हणजेच वैराग्य (*इहामुत्रफलभोगविरागः*) उपजलेला. या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात सांगितलेला '*भवभ्रष्टमना*'. हा संसाराचा उबग किंवा वैराग्य हे कांही पूर्वपुण्याईवाचून येत नाही. याचा सविस्तर विचार योगवासिष्ठांत वैराग्य प्रकरणात पाहावा. अर्थातच ह्या वैराग्यावरून त्याची **धन्य**ता सिद्ध होते. हे वैराग्य हे ज्ञानाच्या चार साधनांचे उपलक्षण जाणावे. (साधनचतुष्टय - १. वैराग्य, २. विवेक, ३. शम-दम-श्रद्धा-तितिक्षा-उपरती-समाधान ही षट्संपत्ती आणि ४. तीव्र मुमुक्षा) गुरुमहाराज त्याला (हे) **संन्यासिन्** असे म्हणत आहेत. याचा अर्थ हा बोध घेणारा शिष्य संन्यासी असला पाहिजे. मग तो '*काम्यानां कर्मणां न्यासम्*' असा विद्वत्संन्यास असो की विविदिषा प्राप्तीनंतर घेतलेला विधिपूर्वक संन्यास असो.

पुढचे संबोधन **गुरुभक्त** असे आहे. सर्व जीवमात्रांत गुढरूपाने अवस्थित असणाऱ्या, मात्र गंभीर, अनिर्वचनीय आणि दुस्तर मायेच्या प्रभावाने अनुभवाला न येणाऱ्या परमाणूपेक्षाही सूक्ष्म आत्म्याचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर आपल्या बुद्धीनेच तर्क करून ते होणार नाही. ते दुसऱ्या ज्ञानी पुरुषांकडूनच मिळवावे लागते (कठ उ.२:९). श्रीमद्भागवतांत (११:३:२२) '*शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्*' अर्थात् ज्याला आत्म्याचे शाब्द - परोक्ष ज्ञानही आहे, जो साक्षात्कारी आहे आणि जो आत्मानंदातच रमलेला आहे अशा गुरूंकडूनच आत्मज्ञान प्राप्त होते. अशाच आत्मज्ञानी पुरुषांना संत म्हणतात. श्रीमदादिशंकराचार्य त्यांच्याविषयीच म्हणतात, '*शान्ता महान्ताः निवसन्ति संताः*

**स्वान्याज्ञं जडमन्या चिन्नामरूपात्मकं जडम् । रोमत्वङ्मांसनाड्यस्थि भुवोऽद्भ्यो मूत्ररेतसी ।।२।।**

स्वान्याज्ञं जडं (ज्ञेयम्) अन्या चित् (ज्ञेया) नामरूपात्मकं जडम्। रोमत्वङ्मांसास्थि भुवः (भवन्ति) मूत्ररेतसी स्वेदः अस्त्र+लाले च अद्भ्यः (भवन्ति)।२।

*वसंतवल्लोकहितं चरन्तः।*' परमार्थात सद्गुरूंच्या अनिवार्यतेची ग्वाही देणाऱ्या श्रुती, स्मृती, पुराणवचने आणि संतवचने किती तरी आहेत. अशा सद्गुरूंना शरण जाऊन त्यांचा आदर करून, त्यांची सेवा करून, त्यांना जिज्ञासू भावाने प्रश्न केल्यावर ते ज्ञानाचा उपदेश करतात असे भ.गीतेचेही वचन आहे (*तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः*।।४.३४।।). केवळ गुरूंकडे जाऊन काम होत नाही तर त्यांना शरण जाऊन त्यांची भक्ती केली पाहिजे असा अभिप्राय आहे. श्वेताश्वतर उपनिषदानुसार ज्याची देवावर भक्ती आहे, आणि देवासारखीच गुरूवरही भक्ती आहे त्या महात्म्याच्याच चित्तात हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील (*यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्येते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः*।।६.२३।।). भगवद्गीतेतही हे ज्ञान अभक्ताला सांगू नये असे म्हटले आहे.

**प्रयोजन -** अशा रीतीने ह्या चार संबोधनांतून त्या शिष्याने आत्मज्ञानप्राप्तीचा अधिकार संपादन केला आहे असे सूचित केल्यावर ग्रंथाचे प्रयोजन '**आत्म+आप्तये मुक्त्यै**' या शब्दांत सांगितले आहे. आत्म्याची प्राप्ती करून घेऊन जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे. शेवटी '**तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव**' या पदातून ह्या ग्रंथाचा विषय स्पष्ट केला आहे. इथे तत्त्वे म्हणजे सांख्ययोगातील प्रतिपादित तत्त्वे. यांची संख्या २५ असून पुढच्या साडेतीन श्लोकांत ती सांगितली आहेत. ह्या तत्त्वांचा अंतर्भाव जडातच होतो हे पुढे स्पष्ट करतील. ही तत्त्वे आणि जड काय आणि चैतन्य काय हे जाणणाराच आत्मज्ञान प्राप्त करून मुक्त होतो.१.

**स्वेदोऽस्रलालेग्नेः क्षुत्तृण्-निद्रा तन्द्रा रतिर्गतिः । लौल्यं निरोधः प्रसाराकुञ्चने मरुतोऽथ खात् ।।३।।**

(स्वेदः, अस्त्र+लाले (भवंति)) अग्नेः (सकाशात्) क्षुत्-तृट्-निद्रा-तंद्रा-रतिः (भवंति) मरुतः (सकाशात्) गतिः+लौल्यं+निरोधः प्रसार+आकुंचने (भवंति)। अथ खात्।३।

**जड -** प्रथम जडाची व्याख्या केली आहे. स्वतःला किंवा इतरांना जे जाणत नाही (**स्व+अन्य+अज्ञं**) ते जड. म्हणजे जाणीवरहित घटपटादि वस्तू म्हणजे जड. यापेक्षा वेगळे जाणीव असणारे ते चेतन (conscious) (**अन्या चित्**). जड हे दृश्य आहे तर चेतन ही दृक् (दृष्टी) आहे. तू, मी, असा प्रत्यय ज्याला येतो तो चेतन पदार्थ आहे. जड हे विषय आहेत तर चेतन विषयी आहे. जगात हेच दोन पदार्थ आहेत. चेतन पदार्थ मुख्य आहे व जड पदार्थ गौण आहेत. चेतन पदार्थ स्वतःसाठी (स्वार्थ) आहे व जड पदार्थ दुसऱ्यासाठी (परार्थ). असे हे जड आणि चेतन पदार्थ प्रकाश आणि अंधाराप्रमाणे परस्परविरुद्ध आहेत. जड वस्तू ह्या चेतनासाठी आहेत. जड हे नामरूपात्मक आहे हा दुसरा सिद्धांत आहे. याचाच अर्थ चेतन हे नामरूपातीत आहे.

आता आपल्याला चेतन वाटत असलेला हा देह हा कसा जड किंवा अचेतन आहे ते सांगत आहेत. त्यासाठी तो कसा पंचमहाभूतांचा बनलेला आहे त्याचे वर्णन केले आहे. प्रथम स्थूल देहाचे किंवा अन्नमय कोशाचे वर्णन आहे.

**पृथ्वी** या भूतापासून रोम, त्वचा, मांस, नाड्या आणि अस्थी झाल्या आहेत. हे पाच पदार्थ पृथ्वीसारखे कठीण आहेत. **जला**पासून मूत्र, वीर्य, घाम, रक्त आणि लाळ हे पाच पातळ, प्रवाही पदार्थ झालेले आहेत.२. **अग्नी**पासून क्षुधा, तृषा, निद्रा, तंद्रा (आळस) आणि रती म्हणजे मैथुन किंवा कांती. **वायू**पासून गती (हालचाल), निरोध, चांचल्य, प्रसरण, आकुंचन हे पाच होतात. **आकाशा**पासून(३) काम, क्रोध, लोभ, लोभ आणि भीती हे पाच.

**कामक्रुड्लोभमोहाभीस्-तदाढ्येयं जडा तनुः । वर्णाश्रमादिद्वन्द्वादि-संबन्धादिपरो भवान् ।।४।।**
**यन्निर्विकल्पं स्फुरति तदन्तःकरणं मनः । तत्सङ्कल्पविकल्पाभ्यां तत्तु धीर्निश्चयात्मकम् ।।५।।**

काम-क्रुड्-लोभ-मोहा+भीः (भवंति) तत्+आढ्या इयं जडा तनुः (अस्ति) भवान् वर्ण+आश्रमादि द्वंद्वादि संबन्धादि परः (अस्ति)।४।
- यन्निर्विकल्पं स्फुरति तत् अन्तःकरणम्। यत् संकल्प+विकल्पाभ्यां (उपलक्षितं) तन्मनः। यत्+निश्चय+आत्मकं तत्+चित्तम्।५।

अशा ह्या पाच भूतांच्या अंशापासून झालेल्या पंचवीस तत्त्वांचा हा जड किंवा स्थूल देह बनलेला आहे. वर्ण, आश्रम इत्यादि, तसेच सुख-दुःखादि द्वंद्वे, पिता, पुत्र इत्यादि संबंध हे या स्थूलदेहालाच आहेत. तू (या बोधरहस्यांत शिष्याला 'आपण' हे बहुमानार्थी संबोधनच वापरले आहे) यांच्या पलीकडे आहेस.४. तहान-भूक आदि प्राणाचे धर्म आणि काम-क्रोधादि मनाचे धर्म वर स्थूलदेहाच्या निरूपणांत आले आहे त्याचा अर्थ त्यांचे स्थूल देहावर होणारे परिणाम असा घ्यावा.

**सूक्ष्म देह -** 'मग ही सुख-दुखांची अनुभूती कुठून येते' याचे उत्तर साक्षी असा जो प्रत्यगात्मा त्याचे अंतःकरणाशी तसेच त्या अंतःकरणाचे स्थूल देहाशी झालेले तादात्म्य हेच आहे. त्या परस्परदेहांच्या तादात्म्यानेच सुख-दुःखांचे आभास होतात हे स्पष्ट करण्यासाठी प्रथम ते अंतःकरण वृत्तींसह सांगितले आहे. तूष्णी किंवा तटस्थ (आपण ज्याला सुन्न किंवा बधीर म्हणतो त्या) अवस्थेत किंवा समाधी अवस्थेत जे वृत्तीरहित स्फुरण होते ते **अंतःकरण** जाणावे. वृत्ती म्हणजे पाण्यावर जशा लाटा उद्भवतात तसे मनावर उठणारे तरंग. योगसूत्रात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, व स्मृती अशा पाच वृत्तींचे वर्णन आहे. त्याशिवाय सुख, दुःख, इच्छा, द्वेष इत्यादि वृत्तीही आहेत. अंतःकरण जेव्हा जाग्रत, स्वप्न या अवस्थात संकल्प आणि विकल्प वृत्तींनी व्यापले जाते तेव्हा त्याला **मन** ही संज्ञा प्राप्त होते. संकल्प म्हणजे एखादी गोष्ट चांगली वाटणे. ह्याच्यापासूनच काम म्हणजे इच्छा उद्भवते. विकल्प म्हणजे आधीच्या कल्पनेपेक्षा वेगळी कल्पना. तेच अंतःकरण एखाद्या गोष्टीचा निश्चय करते तेव्हा त्याला **बुद्धी** असे म्हणतात. उदाहरणार्थ 'गूळ गोड आहे', हा संकल्प आहे. तो आपल्याला अनिष्ट आहे हा विकल्प. हे मनाचे धर्म आहेत. विचारांती तो खाऊ नये असा निश्चय हा बुद्धीने केला जातो.५.

**अनुसन्धानकं चित्तमहङ्कारस्त्वहङ्कृतिः । व्यानाधार्याद्यं श्रुतेस्तु शब्दभुग्वक्ति वाक्सखम् ।।६।।**
**समानाधारि त्वचान्यत् स्पर्शयाशियादातृ दातृ च । उदानाधारा धीर्नेत्राद् रूपभुक्सगमागमा ।।७।।**
**जिह्वया प्राणवच्चित्तं रसभुग्रतिमूत्रकृत् । सापानाहङ्कृतिर्घ्राणाद् गन्धभुग्विड्विसर्गकृत् ।।८।।**

अनुसंधानकं चित्तम्। यत्+अहंकृतिः तत्+अहंकारः (उच्यते)। आद्यं तु व्यान+आधारि श्रुतेः शब्द+भुक् वाक्+सखं वक्ति।६। अन्यत् समान+आधारि त्वचा स्पर्श+आशि आदातृ दातृ च उदान+आधारा धीः नेत्रात् रूप+भुक् स+गम+आगमा (भवति)।७। प्राणवत्+चित्तं जिह्वया रस+भुक् रति+मूत्र+कृत् (भवति) स+अपान+अहंकृतिः घ्राणात् गंध+भुक् विड्+विसर्ग+कृत (भवति)।८।

अनु म्हणजे नंतर संधान ठेवणारे. अर्थात अनुभवानंतर त्याचे स्मरण करणाऱ्या अंतःकरणाला **चित्त** असे म्हणतात. तेच अंतःकरण जेव्हा 'मी' या वृत्तीने स्फुरते तेव्हा त्याला **अहंकार** म्हणतात. एकच अंतःकरण त्याच्या वृत्तींवरून पाच प्रकारे ओळखले जाते. म्हणून या पाचांना अंतःकरणपंचक असेही म्हटले जाते. हे पाच पृथ्व्यादि भूतांच्या सत्त्वगुणापासून झालेले आहेत. त्याच भूतांच्या सत्त्वगुणापासून ज्ञानेंद्रिये, रजोगुणापासून प्राण आणि कर्मेंद्रिये ही जड असूनही तू जो चेतन त्याच्या सान्निध्याने चेतनाप्रमाणेच भासतात आणि व्यवहारही करतात.

पहिले जे **अंतःकरण** ते **व्यान** वायूच्या आश्रयाने श्रोत्रेंद्रियांद्वारा (कानांनी) विविध वर्ण आणि विविध स्वर यांनी युक्त अशा **शब्द** या विषयाचा उपभोग घेते आणि **वाक्**इंद्रियाच्या द्वारां (वाचेने) शब्दांची उत्पत्तीही करते.६.

दुसरे जे **मन** ते **समान** वायूच्या आश्रयाने **त्वचा** (कातडी) **स्पर्श** या विषयाचा भोग घेते, आणि हातांच्या (**हस्त**) माध्यामातून देणे-घेणे या क्रिया करते.

तिसरी **बुद्धी** ही **उदान** वायूच्या आधारे **नेत्र** इंद्रियांनी (डोळ्यांनी) रूप हा विषय भोगते आणि **पाद** म्हणजे पायांनी जाण्यायेण्याच्या क्रिया करते.७.

**कर्मज्ञानेन्द्रियैः पुण्य-पापयोः सुखदुःखयोः। भौतिके पञ्चके कर्तृ-भोक्तृत्वे द्वन्द्वतापि च ।।९।।**
**तल्लिङ्गदेहतादात्म्यात् कर्तृत्वादि वृथार्जितम् । हेतुदेहपरस्वात्म-ज्ञानान्मुक्तिर्ध्रुवाऽचिरात् ।।१०।।**

भौतिके पंचके कर्म+ज्ञान+इंद्रियैः पुण्य+पापयोः सुख+दुःखयोः कर्तृ(त्व)+भोकृत्वे (भवतः) च द्वंद्वतापि (भवति)।९। तत् लिंग+देह+तादात्म्यात् (त्वया) कर्तृत्वादि वृथा अर्जितम्। हेतु+देह+पर+स्व+आत्म+ज्ञानात् अचिरात् मुक्तिः ध्रुवा (अस्ति)।१०।

चौथे **चित्त प्राण** वायूशी जुडून **जिह्वा** (रसना) या इंद्रियांने **रस** या विषयाचा आस्वाद घेते आणि **उपस्थ** (लिंग) या कर्मेंद्रियाने **रति** (मैथुन) आणि **मूत्रोत्सर्ग** या क्रिया करते.

शेवटचा **अहंकार अपान** वायूशी मिळून **घ्राण** (नाक) इंद्रियाने **गंध** (वास) या विषयाचा भोग करते आणि **गुद** इंद्रियांने **मलविसर्ग** करते. ८.

अशा रीतीने पंचधा अंतःकरण आणि पाच प्राण यांच्याद्वारा कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये पुण्य आणि पाप करतात; तेच पाच त्यांची फळे - सुख आणि दुःख, भोगतात; कर्मेंद्रियांकडे कर्तृत्व आणि ज्ञानेंद्रियांकडे भोक्तृत्व आहे. भूक-तहान, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वेही त्याच सूक्ष्मभूतांपासून झालेल्या पंचकाची - म्हणजेच लिंगदेहाची (सूक्ष्मदेहाची) आहेत. अन्नमय स्थूलदेहाशी त्यांचा संबंध नाही. कारण जेव्हां हा लिंगदेह मृत्यूच्या वेळी स्थूल देहापासून वेगळा होतो तेव्हा त्या अचेतन देहात कर्तृत्व-भोक्तृत्वादि राहत नाहीत.९. शीतोष्णादि द्वंद्वे तसेच कर्तृत्व-भोक्तृत्व हे जर लिंगदेहांशीं निगडित आहेत तर मग त्यांच्याशी तुझा कांहीच संबंध नाही हे स्पष्टच आहे. लिंगदेहाशी तादात्म्य झाल्याने, आपण लिंगदेह आहो या अध्यासाने तू उगीचच हे कर्तत्व-भोक्तृत्व स्वतःवर लादलेले आहे. 'तर मग ते कसे नष्ट करता येईल?' असे विचारशील तर ऐक. लिंगदेहाला तुझ्याशी जोडणारा जे कारणदेह (**हेतुदेह**) आहे त्याच्या पलीकडचे जे तुझे आत्मस्वरूप आहे त्याचे ज्ञान होताच तत्क्षणी तुझ्या कर्तृत्व-भोक्तृत्वांचा लोप होऊन तू कायमचा मुक्त होशील.१०.

**स्वदिदृक्षवरराज्ञान-हेतुसाक्षी परो भवान् । निराकारस्वात्मबुद्धि-महाकारणसाक्ष्यपि ।।११।।**
**स्थाणुरन्तर्बहिर्भास्वानात्मारामो निराकृतिः । चतुर्देहपरः साक्षी प्रत्यगीशोऽसि विद्ध्यदः ।।१२।।**

भवान् स्व+दिदृक्षुः+अरर+अज्ञान+हेतु+साक्षी परः असि। निराकार+स्व+आत्म-बुद्धि+महाकारण+साक्षी+अपि (असि)।११। स्थाणुः अन्तः+बहिः+भास्वान् प्रत्यक्+ईशः असि। अदः (मयोक्तं) विद्धि (येन) निः+आकृतिः निः+अभिमानः चतुः+देह+पर आत्म+आरामः च भविष्यसि।१२।

**कारणदेह -** आपल्या स्वरूपाला पाहू इच्छिणाऱ्याला दारासारखे अडवणारे अज्ञान आहे. हेच वर सांगितलेल्या स्थूल आणि लिंगदेहाचे बीज आहे. तेच सर्व ज्ञानाचा उपसंहार करून बुद्धीला आपल्या बीजात किंवा कारणात विलीन करते. हे रोजच झोपेच्या अवस्थेत आपण अनुभवतो. हाच कारणदेह. 'मग हाच आत्मा का म्हणू नये?' तर हा कारणदेह तमोगुणाने व्यापलेला आहे. झोपेतून उठल्यावर 'मी गाढ झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही' असे म्हणणारा तू त्या अज्ञानाला जाणणारा आहेस. तू त्याच्या पलीकडचा, स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा आणि त्यांचे अभिमानी, विश्व, तैजस् आणि प्राज्ञ यांचा साक्षी आहेस. साक्षात् पहाणारा म्हणजे **साक्षी**. असा तू आहेस. 'मी निराकार आत्मस्वरूप आहे' ही जाणीव म्हणजेच **महाकारणदेह**. इथेही सूक्ष्मरूपाने 'मी' ही जाणीव उरलेली असते. त्याच्याही पलीकडे तू आहेस. 'मग मी काय अभावरूपी (जड) आहे?' असे विचारशील तर तसे नाही. कारण त्या अंतिम वृत्तीचाही तू साक्षी आहेस. स्वयंप्रकाश आहेस.११.

**अन्नासुहृद्ध्यहङ्कार-मयतादात्म्यतो भ्रमः । स्थूलः पञ्चीकृतैर्भूतैः सूक्ष्मः कर्मेन्द्रियासुभिः ।।१३।।**
**धीन्द्रियैर्हेतुर्महांश्च तद्विदात्मन्यथोद्धृते । अन्वयव्यतिरेकाभ्यां परं ब्रह्मैव शिष्यते ।।१४।।**

अन्न+अस+हृद्+धी+अहंकार+मय+तादात्म्यतो भ्रमः (भवति)। पंचीकृतैः भूतैः स्थूलः, कर्म+इन्द्रिय+असुभिः सूक्ष्मः, धी+इन्द्रियैः हेतुः, महान् च (अस्ति) अथ तद्विदा अन्वय+व्यतिरेकाभ्यां आत्मनि उद्धृते परं ब्रह्म+एव शिष्यते।१३-१४।

एखाद्या स्तंभासारखा तू निष्क्रिय, निर्विकार आहेस. यालाच कूटस्थ (कूट = ऐरण) असेही म्हणतात. सोनाराच्या ऐरणीसारखा स्थिर, निष्क्रिय राहून त्यावर घडणाऱ्या अलंकाराशी कसलाही संबंध नसणारा. मात्र कूट जसा परिच्छिन्न - देश, काल, वस्तू आदींनी संकुचित असतो तसा तू नाहीस. तू आत आणि बाहेर प्रकाशमान आहेस. ज्ञानस्वरूप आहेस. हे तुझे मी केलेले वर्णन समजून घे, म्हणजे तू निराकार, निरभिमान, चारी देहांच्या पलीकडील आत्माराम होशील.१२.

**पंचकोश -** तुला असे वाटेल की मी सांगत असलेले जाणणे तुझ्या अनादिकालापासूनच्या भ्रमाने प्रभावित बुद्धीला कसे शक्य होईल? तर ऐक, स्फटिकाजवळ जर जास्वंदीचे फूल ठेवले तर तो स्फटिक लाल रंगाने रंगलेला दिसतो. तसेच कांहीसे तुझे या पंचकोशात्मक देहाच्या तादात्म्याने झालेले आहे. जास्वंदीचे ते फूल स्फटिकापासून बाजूला केले की त्याचे शुद्ध शुभ्र धवल स्वरूप स्पष्ट होते तसेच या पाच कोशांपासून धैर्याने आणि विवेकाने कठोपनिषदांतल्या वचनाप्रमाणे मुंज तृणांतून काडी काढावी तसे आत्मस्वरूप पृथक् केल्याने ('*अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा..*' २:६:१७) तुला ते जाणता येईल. यासाठी तुला आता पाच कोशांचा परिचय करून देतो. **अन्न**मय, प्राणमय (**असु**), मनोमय (**हृत्**), विज्ञानमय (**धी** = बुद्धी) आणि आनंदमय (**अहंकार**) हे ते पाच कोश आहेत. यांच्याशी तादात्म्य पावल्यानेच आपण आपल्याला जन्मादि विकारशील, तहान-भूक वगैरे द्वंद्वांनी प्रभावित, संकल्प-विकल्प करणारा, विज्ञानवान् कर्ता आणि आनंदवान् भोक्ता समजतो.

**भानं स्वप्नेऽस्योर्वभानेऽन्वयः प्राग्विस्मृतिः परः । लिङ्गाभानेऽन्वयः स्वाप-भानं प्राग्विस्मृतिः परः ।।१५।।**

स्वप्ने उरु+अभाने अस्य भानं अन्वयः, प्राक् विस्मृतिः परः(व्यतिरेकः)। लिङ्ग+अभाने स्वाप+भानं अन्वयः प्राक् विस्मृतिः परः।१५।

आता हे पाच कोश थोड्या विस्ताराने पाहू. पंचीकृत भूतांपासून झालेला हा स्थूलदेहच **अन्नमय कोश** आहे.१३.

रजोगुणापासून झालेल्या कर्मेंद्रिये आणि पांच प्राण यांचा मिळून सूक्ष्मदेहांतर्गत **प्राणमय** कोश होतो. सत्त्वगुणात्मक ज्ञानेंद्रिये आणि मन यांचा **मनोमय** कोश तसेच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धी यांचा **विज्ञानमय** कोश होतो. इथे श्लोकात मनोमयाचा अंतर्भाव विज्ञानमयात केला आहे. पाचवा **महान्** नावाचा **आनंदमय** कोश आहे. ह्या कोशांना जाणून, अन्वय आणि व्यतिरेक यांनी त्यांच्यापासून आत्मा बुद्धीने निवडून काढला की परब्रह्मच उरते.१४.

अन्वय म्हणजे अनुवृत्ती आणि व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ती. म्हणजे स्वप्नात असताना स्थूल देहाचे भान नसते. तरी हा अपरोक्ष आत्मा स्वप्न पहाणारा साक्षी असतोच. अर्थात् स्वप्नावस्थेत आत्म्याचा अन्वय (अनुवृत्ती) आहे. त्या वेळी आधीच्या स्थूलदेहाची विस्मृती होते. म्हणजेच स्वप्नावस्थेत स्थूलदेहाची व्यतिरेक (व्यावृत्ती) आहे. त्याचप्रमाणे जागेपणी सूक्ष्मदेहाची विस्मृती किंवा व्यतिरेक असतो. पण साक्षी आत्मा इथेही असतोच. म्हणजे त्याचा अन्वय आहेत. गाढ झोपेच्या अवस्थेत स्थूल देह आणि लिंगदेह या दोहींचे पूर्ण विस्मरण होते. अर्थात् त्यांचा व्यतिरेक आहे. त्या वेळी कसलेच ज्ञान नसले तरी झोपेतून उठल्यावर 'मी सुखाने झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही,' असे त्याला आठवते. याचा अर्थ त्या अज्ञान आणि आनंदमय अवस्थेचा अनुभव घेणारा तिथे होताच. त्याशिवाय त्याला ते कसे आठवले असते? म्हणजे या अवस्थेतही आत्मा साक्षित्वाने आहे.१५.

**तद्विदोऽसुमनोध्याख्या गुणावस्थाभिदः पृथक् । सुप्त्यभानेऽन्वयो भानं समाधौ प्राग्वदन्यकः ।।१६।।**
**त्यक्तत्रिदेहसङ्गस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् । स्थितिः परात्परं वस्तु सच्चिच्छर्म निराकृति ।।१७।।**

समाधौ सुप्ति+अभाने (अस्य) भानं अन्वयः अन्यकः प्राग्वत्। गुण+अवस्थाभिदः असु-मनो-धी+ आख्या तद्विदः पृथक् (कृताः)।१६।
त्यक्त+त्रि+देह+संगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् स्थितिः (तदेव) परात्परं निराकृति सत्+चित्+शर्म वस्तु (अस्ति)।१७।

पंचकोशांचे निरूपण चाललेले असता देहाचा अन्वय-व्यतिरेक यांचा विचार असंगत वाटण्याचे कारण नाही. स्थूलदेह हाच अन्नमय कोश आहे; सूक्ष्मदेहात प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय कोश अंतर्भूत आहेत. कारणदेहच प्रिय-मोद-प्रमोद या वृत्तींसहित आनंदमय कोश आहे. प्रिय म्हणजे इष्ट वस्तूचे दर्शन, मोद म्हणजे त्याचा लाभ आणि प्रमोद त्याची अनुभूती अशा ह्या आनंदमय कोशातील वृत्ती आहेत. इथे एकाच लिंग(सूक्ष्म)देहात तीन कोश (प्राण, मन आणि विज्ञान) गुण आणि अवस्था यांच्या भेदाने होतात. राजस कर्मेंद्रिये आणि प्राण यांच्यापासून प्राणमय कोश; ज्ञानेंद्रिये, मन आणि बुद्धी हे तीनही सत्त्वगुणात्मकच असले तरी बाह्य आणि अंतर अवस्थांमुळे दोन कोश होतात. बहिर्मुख इंद्रिये आणि मन यांचा मनोमय कोश आणि अंतर्मुख इंद्रिये आणि बुद्धी यांचा विज्ञानमय कोश. समाधीच्या अवस्थेत सुषुप्तीचेही भान नसते. जागृती आणि स्वप्न या अवस्थांची स्थूल आणि सूक्ष्म देहांसह जाणीव हरपलेली असते. पण समाधीच्या साक्षित्वाने आत्म्याचा अन्वय मात्र इतर अवस्थांसारखाच तिथेही असतोच.१६. अशा रीतीने अन्वय आणि व्यतिरेकाच्या माध्यमांतून पंचकोशांचा विवेक केल्याने स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा अभिमान, संग किंवा लाग टाकून जी कल्पनारहित सुषुप्तीसारखी (सुषुप्ती नव्हे) स्थिती हेच श्रेष्ठतम, निराकार, सच्चिदानंद परब्रह्म आहे. 'हा आत्माच ब्रह्म आहे' हे श्रुतिवचन (मांडूक्य उ. २) यालाच अनुलक्षून आहे.१७. बीजात लीन झालेला वृक्ष जसा भूमी, पाणी आणि ऋतू यांमुळे अंकुरतो व दृश्यमान होतो, त्याचप्रमाणे सुषुप्ती अवस्थेतील अज्ञानात लीन झालेले जगत् आणि देह अज्ञानी जीवाला जागृत अवस्थेत पुनश्च प्रकटून अनुभवाला येतात.

**क्ष्माप्कालैर्बीजलीनद्रुर् यथेक्ष्यो जागृतेस्तथा । सुप्त्यवित्स्थजगद्देहौ तत्परत्वाविदः पुनः ।।१८।।**
**देहान्ते ज्ञस्याहंतास्थ-विश्वाकारोऽनुजन्मदः । अवस्था जागृतिः स्वप्नो निद्रा तुर्या च तुष्टये ।।१९।।**

बीज+लीन+द्रुः क्ष्म+अप्+कालैः यथा ईक्ष्यो (भवति) तथा सुप्ति+अवित्+स्थ+जगत्+देहौ तत्परत्व+अविदः जागृतेः पुनः (ईक्ष्यौ भवतः)।१८। अज्ञस्य देहान्ते अहंता+स्थ+विश्व+आकारः अनुजन्मदः (भवति)। जागृति, स्वप्न, निद्रा, तुर्या च तुष्ट्य अवस्था (ज्ञेयाः)।१९।

सुषुप्ती अवस्थेतील अज्ञान हाच कारणदेह आहे आणि जागृत अवस्थेतील देह आणि जग यांचे तेच बीज आहे असा भावार्थ.१८. जगाचा पसारा स्थूलदेहासहित अज्ञानरूपी बीजात - कारणदेहात लीन होणे आणि झोपेची स्थिती संपल्यावर तो पुनश्च प्रकटणे या दैनंदिन क्रिया आहेत. देहांताच्या वेळी केवळ स्थूल देहाचा नाश होतो. मात्र त्याचा **विश्व** नावाचा अभिमानी तसाच राहतो. त्यात हा विश्वाकार किंवा जगादाकार असतो. झाडाची फांदी तोडल्यावर जसे तिथेच पुन्हा नवी फांदी फुटावी तसा या विश्वाकारापासून नवा जन्म येतो. हा अहंकार केवळ ज्ञानानेच जात असल्याने ज्ञानाभ्यास हा एकच मोक्षाचा उपाय आहे. त्यानेच या चारही देहांचा प्रविलाप म्हणजे पूर्ण लय होतो. त्यासाठी या देहचतुष्टयाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. ते पुढील तालिकेत दिले आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण या देहांचे क्रमशः विषय, स्वप्न, निद्रा आणि समाधिज हे आनंद आहेत.१९. नेत्र, कंठ, हृदय आणि मस्तक ही स्थाने आहेत. विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यक् हे अभिमानी आहेत. स्थूल, सूक्ष्म (प्रविविक्त), मुद आणि उन्मुद (परानंद) हे भोग आहेत.२०. रज, सत्त्व, तम आणि शुद्धसत्त्व हे गुण आहेत. वैखरी, मध्यमा, पश्यन्ती आणि परा या वाचा आहेत.२१. तीन अवस्थात त्याच क्रमाने ॐकाराच्या तीन मात्रा (अ, उ, म) आहेत आणि तुर्यावस्थेत (महाकारण देहात) अर्धमात्रा आहे.

**विश्वतेजःप्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिताः । दृक्कण्ठहृन्मूर्धसंस्थाः स्थूलसूक्ष्ममुदुन्मुदः ।।२०।।**
**भोगा रजःसत्त्वतमः-शुद्धसत्त्वगुणाः क्रमा । वाचोऽत्र वैखरी मध्या पश्यन्ती च परास्त्रिषु ।।२१।।**
**त्रिमात्रा ॐकृतेस्त्वर्धा तुर्ये ज्ञात्वैवमादितः ।**

दृक्+कंठ+हृत्+मूर्ध+संस्थाः विश्व+तेजः+प्राज्ञ+प्रत्यक्+अभिमानिनः ईरिताः। स्थूल+सूक्ष्म+मुद्+उन्मुदः (क्रमेण एषां) ईरिताः।२०। रजः+सत्त्व+तमः शुद्धसत्त्वगुणाः क्रमात् गुणा (ज्ञेयाः) अत्र क्रमात् वैखरी+मध्या+पश्यंती परा च वाचो (ज्ञेयाः)।२१। त्रिषु त्रिमात्रा ॐकृतेः+तु+अर्धा तुर्ये।

## चार देह, त्यांच्या अवस्था, अभिमानी, स्थान इत्यादींची तालिका

| देह | अवस्था | अभिमानी | स्थान | आनंद | भोग | गुण | वाचा | देव | लोक | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थूल | जागृत | विश्व | नेत्र | विषयानंद | स्थूल | रज | वैखरी | ब्रह्मा | भूः | अः |
| सूक्ष्म | स्वप्न | तैजस | कंठ | स्वप्नानंद | प्रविवित्त | सत्त्व | मध्यमा | विष्णु | भुवः | उः |
| कारण | निद्रा | प्राज्ञ | हृदय | निद्रानंद | आनंद | तम | पश्यंती | रुद्र | स्वः | मः |
| महाकारण | तुर्या | प्रत्यक् | मूर्धा | समाध्यानंद | परानंद | शुद्धसत्त्व | परा | आत्मा | महः | अर्धमात्रा |

हे सर्व सविस्तर जाणून घेऊन प्रथम स्थूल देहाचा सूक्ष्म देहात लय करावा. त्या सूक्ष्म देहाचा लय कारणदेहात करावा. त्याचा लय महाकारण देहात केल्यावरच आनंदरूप होऊन स्वरूपात स्थिरावतो. दुसरा कांहीच उपाय नाही. **लय** म्हणजे त्या त्या देहाची आत्यंतिक विस्मृती. सामान्य माणूसही एखाद्या क्रियेत गढून गेला की त्याला देहाची विस्मृती होते; कधी कधी तहान-भूकही हरपतात. संगीताच्या प्रभावाने शरीराचे व मनाचेही दुःख माणूस विसरतो. हेच ज्ञानाभ्यासाच्या वा योगाभ्यासाच्या प्रक्रियेने साधता आले पाहिजे.२२.

**स्थूलः सूक्ष्मे कारणे तत् तन्महाकारणे क्रमात् । प्रविलाप्यानन्दमयः स्वस्थो भवति नान्यथा ॥२२॥**
**तस्माद्देहत्रये लीने धीलयः स समाधिकः । तत्ते परात्परं रूपं निर्विकल्पमवेहि सत् ॥२३॥**
**घटादिवद्द्योर्जीवस्याविद्योपाधिस्तु तत्क्षये । खस्थद्योवत्परात्मत्वं जीवत्वं लीयतेऽचिरात् ॥२४॥**
**ज्ञाते क्षराक्षराहंता-परे तत्त्वे स तन्मयः । सृष्टेः प्राङ्निर्विकल्पैका चिद्ब्रह्मास्मीत्यभूत्त्विह ॥२५॥**

एवं आदितः ज्ञात्वा स्थूलः सूक्ष्मे तत् कारणे तत् महाकारणे क्रमात् प्रविलाप्य आनंदमयः स्वस्थो भवति अन्यथा न।२२। तस्मात् देह+त्रये लीने धी+लयः सः समाधिकः। तत् ते परात् परं सत् निर्विकल्पं रूपं अवेहि।२३। द्योः घट+आदि+वत् जीवस्य तु अविद्या उपाधिः तत्+क्षये ख+स्थ+द्यो+वत् परात्मत्वं (भवति)। जीवत्वं अचिरात् लीयते।२४। क्षर+अक्षर+अहंता+परे तत्त्वे ज्ञाते स तन्मयः (भवति)। सृष्टेः प्राक् एका निर्विकल्पा चित् (आसीत्) इह तु ब्रह्म+अस्मि+इति स्फूर्तिः अभूत्।२५।

अशा रीतीने तीनही देहांचा लय केल्याने प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्त्याकार बुद्धीचाही लय होतो. तीच समाधी होय. तेच तुझे परात्पर, निर्विकल्प सत् रूप आहे हे जाण.२३. आकाशाच्या जशा घट आदि उपाधी आहेत तशीच जीवाची अविद्या ही उपाधी आहे. घटाचा नाश होताच त्याने सीमित झालेले आकाश जसे महाकाशच होऊन जाते तसेच अविद्येची उपाधी नष्ट झाली की जीवदशा संपते आणि मूळचा परमात्मभाव प्राप्त होतो.२४. क्षर म्हणजे सर्व भूतमात्र, अक्षर म्हणजे कूटस्थ (आत्मा) आणि अहंता म्हणजे त्रिदेहरूपी संघाचा अभिमान. या तीन्हींच्या पलीकडले तत्त्व जाणणारा..

**स्फूर्तिः खे वायुवत्साद्या मायाद्यस्तज्ज्ञ ईश्वरः । तत्र विश्वोद्गमेहाभूत्साऽन्या मायाथ तत्र तु ।।२६।।**
**जगत्स्यामिति सङ्कल्पोऽभून्महत्तत्त्वनामकः । विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेशजीवकौ ।२७।।**
**जीवोऽविद्याऽऽवृतः स्वाज्ञो महतोऽहंकृतिस्त्रिधा । क्रियाज्ञानद्रव्यशक्ति-रजःसत्त्वतमोगुणैः ।।२८।।**
**प्राणेन्द्रियान्तःकरण-भूतान्यासन्क्रमात्ततः । ततो लोका विराट् तैश्चिदंशात् कार्यक्षमोऽभवत् ।।२९।।**
**लोकाङ्गस्य रदास्तारा माया हास्यं निशादिने । निमेषोन्मेषौ कटाक्षः सृष्टिः कुक्षिरपांपतिः ।।३०।।**

खे वायुवत् स्फूर्तिः सा आद्या माया तज्ज्ञ ईश्वरः। तत्र विश्व+उद्गम+इहा अभूत् सा अन्या माया अथ तु तत्र जगत्+स्याम्+इति संकल्पो महत्+तत्त्व+नामकः अभूत्। विद्या+अविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेश जीवकौ (ज्ञाते)।२६-२७। अविद्या+आवृतः स्व+अज्ञः जीवः महतः+अहंकृतिः त्रिधा। रजः+सत्त्व+तमो+गुणैः क्रिया+ज्ञान+द्रव्य+शक्तिः (अभूत्)।२८। ततः क्रमात् प्राण+इन्द्रिय+अन्तः करण-भूतानि आसन्। ततः लोकाः (आसन्) विराट् चित्+अंशात् तैः कार्यक्षमः+अभवत्।२९। लोक+अंगस्य तारा रदाः माया हास्यं निशा+दिने निमेष+उन्मेषौ कटाक्षः सृष्टिः अपां पतिः कुक्षिः।३०।

..त्या तत्त्वाशी एकरूप होतो. ते स्पष्ट करण्यासाठी उपक्रम आणि उपसंहार यांचे वर्णन केले आहे.

**उपक्रम -** सृष्टीच्या पूर्वी कल्पनारहित, एकच एक असे चैतन्य होते. शांत निश्चल आकाशात एखादी वायूची लहर उठावी तशा त्या ब्रह्मात 'मी ब्रह्म आहे' अशी वृत्ती निर्माण झाली.२५.

ही जी हवेच्या लहरीसारखी स्फूर्ती झाली तिलाच **आदिमाया** म्हणतात. तिचा ज्ञाता ईश्वर आहे. ह्या सर्वज्ञ, सर्वकर्तृत्ववान् ईश्वराला विश्वाची निर्मिती करावी अशी इच्छा झाली. ही दुसरी माया होय. ही मलिनसत्त्वोपाधिक **अविद्या माया**. तिच्या ठायी 'जगत् व्हावे' असा जो संकल्प झाला त्यालाच **महत् तत्त्व** असे नाव आहे. विद्या माया आणि तिचा ज्ञाता - तिच्यांत प्रतिबिंबित झालेले चैतन्य, हा **सर्वेश्वर**. दुसरी मलिनसत्त्वोपाधिक अविद्या माया आणि

**नाड्यो नद्यो द्रुमाः केशा वृष्टी रेतोऽस्थि पर्वतः । विराजः स्थूलदेहोऽयं चराचरजगन्मयः ।।३१।।**
**दिग्वाय्वर्कप्रचेतोऽश्वि-वह्नीन्द्रोपेन्द्रमृत्युकाः । ज्ञानकर्मेन्द्रियाण्यन्तःकरणानि हरिः शशी ।।३२।।**

नद्यो नाड्यः, द्रुमाः केशाः, वृष्टिः रेतः, पर्वतः अस्थि, (एवं) चराचर+जगत्+मयः अयं विराजः स्थूलदेहः (ज्ञेयः)।३१। दिक्+वायु+अर्क+प्रचेतः+अश्वि+वह्नि+इन्द्र+उपेन्द्र+मृत्यकाः ज्ञान+कर्म+इन्द्रियाणि (बोध्यानि)। हरिः शशी ब्रह्म+नारायण+ईशाः च अन्तःकरणानि। (एवमयं) विराजः सूक्ष्मदेहः।३२।

तिच्यांत प्रतिबिंबित होणारा तिचा ज्ञाता जीव. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, स्वतंत्र, विभू आहे तर जीव अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, परतंत्र आणि परिच्छिन्न आहे.२६-२७. अविद्येने आवृत (झाकलेला) हा जीव स्वतःला जाणत नाही. आदि जीव म्हणजेच ब्रह्मा किंवा हिरण्यगर्भ होय. हा समष्टीचा सूक्ष्म देह आहे. महत्तत्त्वापासून त्रिविध अहंकार झाले. रजोगुणात्मक क्रियाशक्ती, सत्त्वगुणात्मक ज्ञानशक्ती आणि तमोगुणात्मक वस्तुशक्ती असे ते तीन अहंकार होत.२८. राजस अहंकारापासून कर्मेंद्रिये आणि प्राण झाले. सात्त्विक अहंकारापासून पाच ज्ञानेंद्रिये, अंतःकरणपंचक आणि त्यांच्या देवता झाल्या. तामस अहंकारापासून पृथिवी, आप इत्यादि पंच महाभूते झाली. त्या भूतांपासून चतुर्दश भुवने (लोक) झाले. ते असे भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक (स्वर्ग), महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे वरचे सात लोक आणि अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हे सप्तपाताल लोक झाले. त्या लोकांपासून विराट् पुरुष प्रकट झाला. त्या विराटांत चैतन्याचा अंश (चिदंश) प्रवेशल्याने तो कार्यक्षम झाला. हा विराट् समष्टी स्थूलदेह आहे.२९.

**विराट् -** हे चौदा लोकच ज्याचे अवयव आहेत अशा त्या विराटाचे नक्षत्र हे दात आहेत, माया हास्य आहे, रात्र आणि दिवस निमेषोन्मेष आहेत, त्याच्या कटाक्षाने सृष्टी होते, सागर हा त्याची कूस आहे.३०.

**ब्रह्मनारायणेशाश्च सूक्ष्मदेहोऽथ कारणम् । अविद्याऽद्या महत्प्रत्यगीशो देहनिरासतः ।**
**तत्पदं व्यतिरेकात्त्वं-पदं तत्त्वमसि ह्यतः ।।३३।।**
**भूरप्स्वग्नौ ताः स वायौ स खे तत्प्रविलापयेत् । द्रव्ये तमसि तत्सत्त्वे रजः सत्त्वं तमस्यथ ।।३४।।**
**अहंकृतौ तन्महति साविद्यायां लयो द्वयोः । साद्यायां सा ब्रह्मणीत्थं त्वंपदं व्यतिरेकतः ।।३५।।**

अथ अविद्या कारणं, आद्या महत्कारणं, ईशः (एव) प्रत्यक्, व्यतिरेकात् देह+निरासतः त्वपदं (इव) तत्पदं, अतः हि तत् त्वम् असि।३३। भूः अप्सु, ताः अग्नौ, स वायौ, स खे, प्रविलापयेत्। तत् द्रव्ये तमसि, तत् (तमः) रजः सत्त्वे, सत्त्वं तमसि, तत् (तमः) अहंकृतौ, (सा) महति, (स) (महान्) अविद्यायां, द्वयोः (अपि) लयः, सा आद्यायां, सा ब्रह्मणि, इत्थं व्यतिरेकतः त्वं पदं (बोध्यम्)।३४-३५।

नद्या त्या विराटाच्या नाड्या आहेत, वृक्ष त्याचे केस आहेत, वृष्टी रेत आहे, पर्वत अस्थी आहेत. असा हा चराचर जगत्स्वरूप विराट् ह्याला (समष्टीचा) स्थूलदेह जाणावा.३१.

**हिरण्यगर्भ -** दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इन्द्र, उपेन्द्र आणि यम ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. (क्रमशः कान, त्वचा, नेत्र, रसना, नासिका, वाणी, हात, पाय, गुद आहेत. प्रजापती ज्याचे उपस्थ आहे.) समष्टीची इंद्रिये ही व्यष्टीच्या (जीवाच्या) इंद्रियांच्या देवता आहेत. जीवाच्या इंद्रियांची कार्यक्षमता ही समष्टीच्या इंद्रियरूप देवतांच्या अनुग्रहावर अवलंबून आहे. हरी त्याचे अंतःकरण आहे तर चंद्र मन आहे.३२. ब्रह्मदेव त्याची बुद्धी आहे आणि रुद्र अहंकार आहे. हा विराट पुरुषाचा (समष्टीचा) सूक्ष्म देह होय. यालाच हिरण्यगर्भ किंवा सूत्रात्मा असेही म्हणतात. अविद्या हा समष्टीचा कारण देह आहे तर आदिमाया (विद्यामाया) महाकारण देह आहे. ईश्वर हा समष्टीचा प्रत्यगात्मा आहे. वर ज्याप्रमाणे जीवाच्या तीन देहांचा निरास किंवा लय करून त्याचे प्रत्यक् स्वरूप सिद्ध केले, त्याच प्रकारे समष्टीच्या तीन देहांचा (विराट, हिरण्यगर्भ आणि अविद्या माया) लय केला की जीवाचे ईश्वराशी

**व्याख्यारूपैकसद्वस्तु सृष्टेः प्राक् चाधुनापि तत् । त्वं श्रोत्रात्मेन्द्रियातीतमस्यैक्यमनुभूयताम् ।।३६।।**
**सृष्टेः प्राक् सच्चिदानन्द-रूपोऽद्याहङ्कृतेर्लयात् । प्राग्वदूर्ध्वमपीदृक्त्वं या सृष्ट्यस्तित्वकल्पना ।।३७।।**
**गवाधाराहङ्कृतेः प्राक्-स्थानाभावान्न साद्य चेत् । तद्वत्क्वास्ति त्वमेकोऽतोऽद्वितीयो ब्रह्म चिन्मयः ।।३८।।**

व्याख्या+रूप+एकसत्+वस्तु (यत्) सृष्टेः प्राक्+अधुना+अपि तत्। श्रोत्र+आत्म+इन्द्रिय+अतीतं त्वं असि। ऐक्यं अनुभूयताम्।३६। सृष्टेः प्राक् त्वं सच्चिदानन्दरूपः (आसीः)। अद्य अहंकृतेः लयात् प्राक् वत् सच्चिदानंदरूपः (असि)। ऊर्ध्वं अपि ईदृक (भविष्यसि)। अहंकृतेः प्राक् या सष्टि+अस्तित्व+कल्पना सा गो+आधारा अद्य न। चेत् तद्वत् क्व अस्ति? अतः त्वं एकः अद्वितीयः चिन्मयः ब्रह्म (असि)।३७-३८।

ऐक्य सिद्ध होते. 'तो तू आहेस' या महावाक्यातील 'तू' या पदाने (*त्वंपदाने*) लक्षिलेल्या जीवाची, 'तो' या पदाने *(तत्पद)* दर्शविलेल्या ईश्वराशी एकरूपता आहे हा निश्चय होतो.३३.

**उपसंहार -** आता हा निरास कसा करायचा ते सांगत आहेत. पृथ्वीचा लय जलात करायचा; त्या जलाचा लय तेजात (अग्नीत) करायचा; तो अग्नी वायूत विलीन करायचा; आणि वायूचा आकाशात लय करायचा. ते आकाश द्रव्यात्मक तमोगुणात विलीन करायचे. मग तमोगुणाचा (अहंकारातील) रजोगुणात, रजोगुणाचा (अहंकारातील) सत्त्वगुणात आणि सत्त्वगुणाचा (अहंकारातील) तमोगुणात लय करावा.३४. तो तमोगुण अहंकारात लीन करून अहंकाराचा लय अविद्यामायेत करावा. अशा रीतीने विराजाच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांचे प्रविलापन होते. मग अविद्यामायेचा लय आदिमायेत आणि तिचा लय ब्रह्मात करावा. अशा रीतीने सर्व विलापांची सीमा जे ब्रह्म तेच उरते. ते व 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ आहे. याच प्रकारने देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी यांचा विलय करून उरलेला जो प्रत्यगात्मा तोच 'त्वं' पदाने लक्षिलेला आहे.३५.

**ब्रह्मबुद्ध्या द्वयाभावाद् देह्यहंकृतिसंक्षयात् । शिष्यतेऽत्र निराकारः क्वाख्यारूपात्मकं जगत् ।।३९।।**
**स्रग्भोगिवद्दृष्टमपि ज्ञानदीपान्न ते भ्रमः । ज्ञानं त्यक्त्वा दृढाभ्यासी भ्रमेणापि न युज्यते ।।४०।।**

ब्रह्म+बुद्ध्या अहंकृति+संक्षयात् द्वय+अभावात् अत्र देही निराकारः शिष्यते। आख्या+रूपात्मकं जगत् क्व?।३९। स्त्रक्+भोगि+वत् दृष्टं अपि (जगत्) ज्ञान+दीपात् ते भ्रमः न। दृढ+अभ्यासी ज्ञानं त्यक्त्वा अपि भ्रमेण न युज्यते।४०।

**तत्त्वमसि -** या दोहोंचे ऐक्य दाखविण्यासाठी महावाक्याचे आता निरूपण करीत आहे. नाम आणि रूप यांच्या पलीकडील एकमेवाद्वितीय (सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदांनी रहित) जी वस्तू सृष्टीच्या पूर्वीही होती, आज स्थितीच्या काळातही आहे आणि प्रलयानंतरही राहणारच आहे.

छांदोग्यात (*वाचारंभणं विकारो नामधेयम्।* ६:१:४)) सोन्याच्या विविध अलंकारांची नावे जरी वेगळी असली तरी त्यातील सोन्यात कांहीच फरक नसतो, या दृष्टांताने संपूर्ण चराचर जगत हे एकाच ब्रह्माचे विकारभूत आहेत. त्याची नावे जरी वेगवेगळी असली तरी ती बोलण्यासाठी आहेत. ब्रह्मस्वरूपात कांही फरक पडत नाही. तसेच बृहदारण्यक उपनिषदांत (३:४:२) 'याच्याशिवाय इतर सर्व दुःखमूलक- नाशिवंत आहे.' असे म्हटले आहे. ह्या श्रुती याच ब्रह्मवस्तूचा निर्देश करतात. हेच 'तत्'पदाचे लक्ष्य आहे. हे ऐकणारा जो तू आहेस त्याचा देह, इंद्रिये, मन, बुद्धी आदींच्या संघाताच्या पलीकडचा आहेस. त्यांच्या प्रविलापनाने उरलेले जे प्रत्यक्, साक्षी चैतन्य आहे तेच 'त्वं'पदाचे लक्ष्य आहे. या महावाक्यांत या दोन्ही पदांची 'असि' या पदाने समानता प्रतिपादली आहे. याच्या अखंडत्वाने हे दोन्ही - जीव आणि परब्रह्म, 'तेच तू' आणि 'तूच ते' अशी एकरस एकरूपता तुला निदिध्यासनादि क्रमांनी अपरोक्षतया (प्रत्यक्ष) अनुभवायची आहे.३६. सृष्टीच्या पूर्वी तू सच्चिदानंदस्वरूप होतास. आता अहंकाराचा लय झाल्यावर आणि तुझ्या सर्व उपाधी गळून पडल्यावर तू पूर्वीसारखाच सच्चिदानंदरूप आहेस. यानंतरही - विदेह कैवल्यानंतरही असाच सच्चिदानंदरूप राहणार आहेस. अर्थात् तू एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहेस. शिष्याच्या मनांत

**स्रज्यह्यभावः प्रागूर्ध्वं तद्वद् ब्रह्मणि चास्य तु । अभावाच्छून्यता मैहि तज्ज्ञ सच्चित्सुखात्मक ॥४१॥**
**भास्वान्नित्यः प्रबोधोऽयं वेदा भ्रान्तहितैषिणः । साधकान्यद्य कार्याणि साध्याभावान्न कुर्वतः ॥४२॥**

यथा स्रजि अहि+अभावः तद्वत् प्राक् ऊर्ध्व च ब्रह्मणि अस्य तु (अभावः) तत्+ज्ञ सच्चित्सुखात्मक अभावात् शून्यता मा एहि।४१।
अयं प्रबोधः भास्वान् नित्यः (अस्ति)। वेदाः भ्रान्त+हितैषिणः (सन्ति) अतः साधकानि कार्याणि। अद्य साध्य+अभावात् न कुरु।४२।

अशी शंका आहे की, 'ही माझ्याहून वेगळी अशी सृष्टी मला प्रत्यक्ष दिसते आहे, अनुभवाला येते आहे तर मग मी अद्वितीय कसा असेन?' गुरुमहाराज सांगत आहेत, 'पूर्वी इंद्रियादींच्याविषयी अध्यासाने जो अहंकार होता त्याच्या आधाराने सृष्टीच्या अस्तित्वाची कल्पना होती. पण आता तुला ज्ञान झाले असल्याने तुला सर्व कांही इंद्रियादिक आत्ममयच झाले आहे. त्या सृष्टीच्या अस्तित्वाच्या कल्पनेला आता आधारच राहिला नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) सांगितल्याप्रमाणे सर्व कांही एकरूपच झाले आहे. मग कोण कुणाला पाहील, कोण कुणाला जाणील?'३७. आता पूर्वीसारखी सृष्टी शोधूनही सापडणार नाही. अंधारात भासलेला साप, दिवा आणून पाहिल्यावर, आणि ती दोरी असल्याचे जाणल्यावर, पुन्हा हुडकूनही सांपडणार नाही. तो ना कधी होता, ना आता आहे, ना पुढे कधी असेल.३८. बुद्धीची वृत्ती अखंडतया ब्रह्माकार झाली की निराकार स्वरूपच उरते. तिथे नामरूपात्मक जगत् कुठे असणार?३९. भोगकाळामध्ये कदाचित् कधी माळेवर भासणाऱ्या सापासारखा जगाचा भास जरी तुला झालाच तरी आता ज्ञानदीप तेवत असल्याने तो भ्रम टिकणार नाही. 'मग हा ज्ञानदीप किती काळपर्यंत राखून ठेवायचा' असे विचारशील तर 'अभ्यास दृढ होईपर्यंत' हे त्याचे उत्तर आहे. एकदा अभ्यास दृढ झाला की मग ज्ञान आवर्जून सांभाळावे लागत नाही. पण त्यासाठी स्वप्नातही 'मी ब्रह्म आहे' ही भावना स्थिर राहिली पाहिजे.४०.

**भगवत्वाक्यतोऽसक्तः कुरु वा तैर्न लिप्यसे । मनो विनापि ज्ञातासि ध्यानादेः किं प्रयोजनम् ।।४३।।**

वा भगवत्+वाक्यतः असक्तः (सन्) कुरु तैर्न लिपसे। (त्वं) मनोविना अपि ज्ञाता असि (अतः) ध्यान+आदेः किं प्रयोजनम्।४३।

**ज्ञानी पुरुषाने कर्म करावे का?** जसा माळेत सापाचा अभाव तीनही काळात आहे, तसाच ब्रह्मात भ्रमाच्या पूर्वी आणि ज्ञानाच्या नंतरही आहेच. पण अभावालाच मोक्ष मानून शून्यतेचा अंगीकार करू नकोस. कारण त्या अभावाला जाणणारा सच्चिदानंदस्वरूप असा तू आहेसच.४१. तुला हा जो प्रकाशरूप बोध झाला आहे तो आजच झाला असे नाही. हा नित्यच आहे. कधीही नष्ट न होणारा आहे. 'हा जर नित्यच आहे तर वेद ह्या बोधाच्या प्राप्तीसाठी का उपदेश करतात?' या शिष्याच्या प्रश्नाला उत्तर आहे की, भ्रान्तीने देहालाच आपले स्वरूप मानणाऱ्या कल्याणकामी लोकांसाठी वेदांचा उपदेश आहे. तो मुक्तासांठी नाही. ज्यांना आत्मज्ञान हे साध्य आहे अशा साधकांनी वेदांनी उपदेशिलेली साधने करावीत. आत्मज्ञान झाल्यावर त्याची आवश्यकता राहत नाही. तेव्हा आता तू कांहीही साधन करूं नकोस. भ.गीतेत (३:१८) हेच सांगितले आहे. '*नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।*' त्याला कांही करण्याने वा न करण्याने कांहीच कमवायचे वा गमवायचे नसते.४२. किंवा तिथेच पुढे २५ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे लोकसंग्रह करण्यासाठी, लोकांना धडा घालून देण्यासाठी निरासक्त बुद्धीने कर्मे करावीत. आसक्ती आणि अहंकाराचा तुझ्या ठिकाणी अभाव असल्याने तू त्या कर्मांनी लिप्त होणार नाहीस. 'मग निदिध्यासनादि करावे कां?' या शिष्याच्या प्रश्नाला अपक्षून सांगितले आहे की त्याचीही आवश्यकता नाही. तुला देहाच्या ठिकाणी विपर्यस्त अहंभावना नसल्याने आणि तू मनाशिवायच स्वरूपाला जाणत असल्याने ध्यानादींचे काय प्रयोजन? पंचदशीत (तृप्तिदीप २६१) विपर्यस्ताला ध्यानाची आवश्यकता आहे अविपर्यस्ताला नाही असे प्रतिपादन आहे.४३. '*तस्य तावदेव चिरं*' (छांदोग्य उपनिषद ६:१४:२) या श्रुतीनुसार जोवर प्रारब्ध आहे तोवर हा पंचकोशात्मक देह राहील. मात्र, वर्ण, आश्रम, संबंध इत्यादि देहाचे धर्म, भूक, तहान इत्यादि प्राणाचे धर्म तसेच शोकमोहादि मनाचे धर्म, यांचा आता तुझ्याशी कांहीच संबंध नाही.

**अदेहप्राणहृद्धर्मः प्रारब्धाशीः सुखं वस । इदं रहस्यं बोधाख्यं तज्ज्ञो ब्रह्ममयो भवेत् ।।४४।।**

**इति बोधाख्यं द्वितीयं रहस्यम् ।।**

**समाप्तोऽयं ग्रन्थः प्रीयतामनेन श्रीदत्तः ।।**

**इति श्रीमत्परमहंस परिव्रजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती (टेम्बे) स्वामिविरचितं**

**श्रीगुरुचरितं सम्पूर्णम् ।।**

अ+देह+प्राण+हृत्+धर्मः (सन्) प्रारब्ध+आशीः सुखं वस। इदं बोधाख्यं (अति) रहस्यं तत्+ज्ञः ब्रह्म+मयः भवेत्।४४।

आता तू केवळ साक्षित्वाने प्रारब्धाचा वाहक बनून राहा. (पुढील अर्धश्लोक ग्रन्थालंकार आहे) हे 'बोध' नावाचे रहस्य आहे. रहस्य म्हणजे वेदांचा गोपनीय भाग जो अधिकारी श्रोत्यांच्याच (वाचकांच्या, ग्राहकांच्या) पदरी पडतो. हे रहस्य जाणणारा ब्रह्मरूप होतो. कठोपनिषदाच्या (२:३:८) प्रतिपादनानुसार 'जे जाणल्याने जीव बंधनांतून मुक्त होऊन अमृतत्व पावतात' तेच हे रहस्य होय.४४.

**इति द्वितीयं रहस्यं । संपूर्णोऽयं टीकाग्रंथः । प्रीयतामनेन सर्वान्तर्यामी भगवान्श्रीदत्तसद्गुरुः ।।**

**ज्ञानं त्रयोदाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः । पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट् ।।१।।**

**पाचात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताऽखिलानाम् ।**

**श्रीद्वारकायां चरितस्य तस्य श्रीसद्गुरोर्वेदनुतस्य तस्य ।।२।।**

**शालिवाहनाके क्ष्माश्विवसुभूमिमिते (१८२१) त्वियं ।**

**टीका संपूर्णतां प्राप्ता चातुर्मास्ये ह्यवर्षके ।।३।। ।। संवत् १९५६ ।।**

हा टीकाग्रंथ इथे संपूर्ण झाला. याने सर्वान्तर्यामी भगवान श्रीदत्तसद्गुरू प्रसन्न होवोत. तेरा अध्यायात ज्ञानयोग, नंतरच्या पाच अध्यायात कर्मयोग आणि शेवटच्या पाच अध्यायात भक्तियोग यांचे निरूपण योगिराज दत्तात्रेयांनीच करविले. त्या वेदवंद्य सद्गुरूंच्या चरित्रावरील नऊ अध्यायांवरची टीका पश्चिम समुद्राच्या तीरावर प्रभास क्षेत्री (ग्रंथ जवळ नसतांनाही) संपन्न झाली. शेष सर्व ग्रंथ श्रीक्षेत्र द्वारकेच्या चातुर्मासात शालिवाहन शकाच्या १८२१व्या वर्षी अवर्षणात पूर्ण झाला. संवत् १९५६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील बोधरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**पहिली आवृत्ती ---------**

**प्रकाशक :**

१. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा.

२. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती स्वामिमहाराज व श्री. लोकनाथतीर्थ स्वामिमहाराज ट्रस्ट, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

३. श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, नारेश्वर, पोस्ट सायर, व्हाया अंकलेश्वर, जि.वडोदरा ३९३१०७.



**मुद्रक**

के. जोशी आणि कंपनी
सदाशिव पेठ, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी - ०२०-२४४७१४०९
kjoshipress@gmail.com

संपादक.

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख,ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध, पुणे ४११००७.

**प्राप्तिस्थान**

श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

**मूल्य - रु. २००/-**

## ।। श्रीगुरुः शरणम् ।।





मला द्विसाहस्री ग्रंथाची उपासना देणाऱ्या

सद्गुरु प.पू.योगिराज वा.द.गुळवणीमहाराज

आणि  त्या ग्रंथांत प्रवेश करविणाऱ्या  प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर

यांच्या चरणकमलीं समर्पित

**(पू.डॉ.धीरूभाई जोशी, अध्यक्ष, श्रीवासुदेवप्रबोधिनी व प्रमुख विश्वस्त श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, वडोदरा यांचा आशीर्वाद.)**

# अस्मदीयम्।

'द्विसाहस्री गुरुचरितम्' लोके ऱ्हस्वत्वात् शीघ्रफलदत्वाच्च प्रियं तथा विद्वत्सु साहित्यिकगुणत्वादुत्कृष्टटीकोपेतत्वादतीव संमान्यम्। अतः तद्ग्रन्थस्य लौकिकभाषायामनेकभाषान्तराणि जातानि।

अयं ग्रन्थोऽपि तद्वन्महाराष्ट्रभाषायां परिवृत्तोऽस्ति। तस्यानुवादकोऽपि डॉ. वा. व्यं. देशमुखो भक्तहृदयः, संस्कृत-प्राकृतभाषानिष्णातोऽस्ति लोके लब्धप्रतिष्ठितः। विशेषतः ब्रह्मलीनो ब्रह्मश्रीकवीश्वरशास्त्रिपदानुरागी तथा च तत्कृपालब्धो वर्तते। अतोऽस्य ग्रन्थस्य महिमा।

प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीमहाराजैरनेकग्रन्थान् रचितान्। 'प्रबोधिनी' तेषां भक्तजनमध्ये प्रसारकार्यं करोति। अद्य स्वामिसमाधीशताब्दिवर्षेऽयं ग्रन्थः प्रकाश्यते। तत्समीचीनं प्रशस्यं च। तदुपरि स्वामिमहाराजचरणानां शुभाशीर्वादाः सन्तु। भक्तजनेषु तत्प्रियतमो भवत्विति मे शुभाशा।

तत्प्रकाशने यैः प्रयत्नशीलैः यद्यत्सकार्यं कृतमस्ति तत्तत्तु सर्वथाऽभिनन्दनीयमस्ति। अस्य द्वितीयावृत्तिः शीघ्रं प्रकाशं पश्यतु।

भवदीयो

**हरिप्रसादः (धीरूभाई) जोशी.**

# प्रस्तावना.

**।। श्रीगुरुः शरणं मम।।**

सद्गुरु भगवान श्रीदत्तात्रेय का आविर्भाव बोध-अवतार रूप होने के प्रतिपादन से ही 'श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)' ग्रंथ का आरंभ होता है। उसी क्रम में श्री श्रीपादश्रीवल्लभ एवं श्री नरसिंह सरस्वती सद्गुरु की बोध-अवतार रूप में लीलाएँ हुई हैं। उसी क्रम में प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजश्री के बोध-अवतारकृत्य स्वरूप लीलाओं का विशद निरूपण पूजनीय श्री रङ्ग अवधूत महाराजश्री विरचित त्रिकाण्डात्मक वरद ग्रन्थ 'श्रीगुरुलीलामृत' के उपासनाकाण्ड एवं उन के अनुपम स्तोत्र 'श्रीवासुदेवनामसुधास्तोत्र' में दृष्टव्य है।

१) **तत्त्वज्ञानमुपादिश्य**... अर्थात् उन्हों ने माता (पूजनीया रमामाई) व पत्नी (पूजनीया अन्नपूर्णा माता) को तत्त्वज्ञान का उपदेश दिया... (श्लोक १९).

२) **भाष्यादि श्रावयामास**....जालवण (गांव) में भाविक भक्तों को भाष्य का श्रवण कराया.(श्लोक २६).

३) **योऽधिकारभिदा ग्रन्थान् रचयित्वा सुबोधकान्। उद्दधार भवे मग्नान् वासुदेव नमोऽस्तु ते।।५०।।** अर्थात् जिन्हों ने भवसागर में मग्न=रममाण लोगों का उद्धार करने के लिए उन के अधिकार भेद के अनुसार (अनेक) सुबोध व सरल=सुबोधात्मक ग्रंथों की रचना की।

पूजनीय स्वामी महाराज विरचित सद्बोधात्मक ग्रन्थों की सूची में श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री) ग्रन्थ अपने रचनास्वरूप वैशिष्ट्य एवं निरूपण रीति वैशिष्ट्य के उपरान्त औपासनिक उपादेयता वैशिष्ट्य से अनुपम वरद ग्रन्थ है।

ग्रन्थ श्रीगुरुतत्त्व-विमर्शात्मक है। गुरुतत्त्व ही मानवी साधना का चरम लक्ष्य व परम प्राप्तव्य है। श्रीगुरुतत्त्व अखण्ड आनन्द एकरस ज्ञानस्वरूप अर्थात् तत्त्वतः निर्विशेष - निर्गुण परब्रह्म स्वरूप होते हुए भी श्रीपादश्रीवल्लभ एवं नरसिंह सरस्वती अपने संन्यासी चरित द्वारा प्रत्यक्ष रूप में अपने भक्त उपासकों को दिव्यमन्त्र व अभीष्टफलप्रदान रूप अनुग्रह करते हैं। अतः श्रीगुरुराज सविशेष-निर्विशेष = सगुण-निर्गुण दोनों रूपों में उपास्य परब्रह्म हैं। मन्त्र ही देवस्वरूप है, इस सिद्धान्त के अनुसार प्रस्तुत ग्रन्थ सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय स्वरूपभूत श्रीश्रीपादश्रीवल्लभ-श्रीनरसिंह सरस्वती सद्गुरु अभिन्न मन्त्रमय ग्रन्थ है। स्वभक्त अभीष्ट प्रदानात्मक है, यथा :- **मुमुक्षुभेषजं मुक्तजीवनं विषयीष्टदम्। श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वात् वच्मि तेऽल्पकम्।।(३:९).** स्वोपज्ञ टीका में भगवान ग्रन्थकार कहते हैं, 'श्रीसद्गुरु का चरित्र (यद्यपि हृदय व वाणी से अत्यन्त दूर - अगम्य है, तथापि मैं तुम्हें थोडा सा कहता हूँ) विषयी जनों को अभीष्ट (अर्थ-काम) प्रदान करने वाला, मुमुक्षु भक्तो को संसार-रोग निवारक औषध और मुक्तों को निरुपम आह्लाद-जीवनभूत, कृतघ्नत्वनिवृत्ति रूप जीवनसाफल्य प्रदान करनेवाला है।'

यद्यपि सकल अभीष्ट अर्थ प्रदान करने वाली अनेक मन्त्र उपासनाएँ विभिन्न तन्त्र ग्रन्थों में प्रसिद्ध हैं, तथापि वे प्रायः शापित होने से, उनका प्रभाव कीलकत्व से प्रतिबद्ध होने के कारण शापविमोचन, उत्कीलन, आवरणपूजा, बलिदान आदि में थोडा सा भी वैगुण्य आने से उपासना का फल प्राप्त नही होता है। प्रस्तुत उपासना ग्रन्थ (और पूरी श्रीदत्तात्रेय उपासना प्रणाली) में कहीं किसी शापजनित प्रतिबद्धता न होने से यह समग्र उपासना अनायास फलदायी होने का प्रतिपादन भगवान ग्रन्थकार ने किया है। अतः अनायास फलप्राप्ति प्रस्तुत ग्रन्थ-उपासना का एक वैशिष्ट्य है।

श्रीगुरुचरितम्(द्विसाहस्री) स्वयं मन्त्रमय उपासना ग्रन्थ है और उस पर लिखी गई स्वोपज्ञ संस्कृत टीका अपने आप में एक स्वतन्त्र ग्रन्थ है, वस्तुतः ये दो ग्रन्थ हैं। दोनों की संस्कृत भाषा अत्यन्त प्राञ्जल है। मराठी भाषा में यह

ग्रन्थराज अनुवाद के रूप में पहले सी ही प्राप्त है। गुजराती व हिन्दी में भी ग्रन्थ का अनुवाद उपलब्ध है। यहाँ प्रस्तुत ग्रन्थ में विद्वान्, अनन्य उपासक व अनुग्रहीत भक्त अनुवादकजी ने प्रत्येक श्लोक का अन्वय, श्लोकार्थ एवं स्वोपज्ञ टीका पर आधारित विशद विवरण दे कर उपासक भक्तों के लिए एक सहायक मार्गदर्शक ग्रन्थ प्रदान किया है।

अनुवादक डॉ.श्री वासुदेव व्यं. देशमुखजी मूलतः चिकित्साशास्त्र की पॅथॉलोजी विद्या शाखा के गणमान्य अभ्यासी व प्राध्यापक, अनुसन्धानकर्ता के रूप में सर्विस प्रदान करने के बाद ऐच्छिक निवृत्त जीवन अध्यात्म मार्ग में व्यतीत कर रहे हैं। अपने कार्यक्षेत्र में सफल सिद्धि प्राप्त करने के साथ आपने प.पू. योगिराज श्रीगुळवणी महाराजश्री से अनुग्रहित हो कर, प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वरजी के सान्निध्य में रह कर जो आध्यात्मिक सिद्धि प्राप्त की है, उसका स्पष्ट प्रतिबिम्ब उनके व्यक्तित्व, कर्तृत्व में दृष्टिगोचर होता है। कम्प्युटर सिद्धिद्वारा उन्हों ने भक्तसमुदाय के लिए जो कार्य किया है वह अपने आप में अप्रतिम है।

सम्प्रति पूजनीय स्वामी महाराजश्री के समाधि शताब्दि वर्ष में प्रस्तुत ग्रन्थ एक सम्मान्य अनुवादक की साधना के फलस्वरूप विशाल जनसमाज को प्राप्त हो रहा है। सम्माननीय डॉ.श्री देशमुखजी एवं सम्माननीय प्रकाशन व्यवस्था का अभिवादन करते हुए मैं आनन्द और धन्यता का अनुभव करता हूँ।

**।। प्रीयतां अनेन सद्गुरु भगवान श्री रङ्गावधूतः इति।।**

**वल्लभविद्यानगर** **शास्त्री जयेन्द्र दवे**

**गुरुपौर्णिमा दिनांक २२/७/२०१३, सोमवार**

**श्रीगुरुः शरणम्।**

**श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री संहिता)**

## ग्रंथप्रवेश.

**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नमम्बासुतः स्तुतः। गन्धर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि।।**

**नमस्ते शारदे देवि वीणावादनतत्परे। सरस्वती जगन्माता सा मे बुद्धिं प्रचोदयात्।।**

**वासुदेवयतिं वन्दे वामनं मम सद्गुरुम्। कवीश्वरं च दत्ताख्यं याचे मतिप्रकाशनम्।।**

**वाङ्मयं वासुदेवस्य गहनं सागरादपि। चिंतनाय प्रवृत्तोऽस्मि मंदोऽप्यंतरशुद्धये।।४।।**

### श्रीगुरुचरित्र.

चौदाव्या शतकांत परधर्मीयांच्या आक्रमणांनी दक्षिण भारत व्यापून टाकला. बहामनी राजवटीने याच काळांत आपला जम बसविला होता. आक्रमणाला राजकीय आणि धार्मिक अशी दोन्ही अंगे होती. सनातन वैदिक धर्माच्या मुळावरच घाव बसत होते. धर्माचे आचरण, धर्माची मूलतत्त्वे आणि परंपरा या सर्वांनाच ग्लानि आली होती. एकीकडे हिंदू राजांची सत्ता कोलमडत होती तर दुसरीकडे समाजाला धर्माचे मार्गदर्शन करणारा ब्राह्मणवर्गच आचारभ्रष्ट होऊं लागला होता. *'यदा यदा हि धर्मस्य..'* या गीतावचनानुसार ईश्वरी अवतार प्रकट झाले. प्रथम आंध्र प्रदेशांत पूर्वसागराच्या जवळ पीठापूर येथे आचाराने आणि ऐहिक समृद्धीने संपन्न अशा ब्राह्मण कुळांत श्रीपादश्रीवल्लभ यांचा अवतार झाला. हाच श्रीदत्तात्रेयप्रभूंचा कलियुगांतील पहिला अवतार मानला जातो. श्रीपादश्रीवल्लभांच्या नंतर कांही दशकांत (इ.स. १३७८) श्रीदत्तप्रभूंचा द्वितीय अवतार श्रीनृसिंहसरस्वती यांचा जन्म झाला. या दोन्ही अवतारांचे कार्य परस्परपूरक असे झाले आहे.

यांनी हिंदू समाजाच्या सर्व घटकांच्या धार्मिक श्रद्धा तर दृढ केल्याच, पण तत्कालीन मुसलमान समाजावरही त्यांचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः ब्राह्मण समाजाला त्यांच्या धार्मिक जबाबदाऱ्यांची जाणीव करून देऊन आणि त्यांच्यात *'धर्मो रक्षति रक्षितः'* हा आत्मविश्वास निर्माण करून मुसलमानी धर्माच्या आक्रमणाला आळा घातला. या दोन महान विभूतींचे कार्य ज्ञानेश्वर-नामदेव आदि समकालीन आणि एकनाथ-तुकाराम आदि आगामी साधुसंतांच्या कार्याला पूरक असेच झाले आहे. संत एकनाथमहाराजांचे सद्गुरु संत जनार्दनस्वामी हे श्रीनृसिंहसरस्वतींचे शिष्यच होते.

या दोन अवतारांचे, मुख्यतः श्रीनृसिंहसरस्वतींचे चरित्र हा श्रीगुरुचरित्राचा विषय आहे. श्रीगुरुचरित्राचे लेखक सरस्वती गंगाधर साखरे हे कर्नाटकांतील कडगंची (उत्तरकांची) ह्या गांवचे. त्यांचे वडील गंगाधर यांचे पणजोबा सायंदेव साखरे हे श्रीनृसिंहसरस्वतींच्या प्रमुख शिष्यांत गणले जातात. लेखकाने आपल्याला 'महाराष्ट्र भाषा' येत नाही असे म्हटले असले तरी या ग्रंथाच्या व्युत्पन्न भाषेवरून तो त्यांचा विनयच आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. ह्या ग्रंथांत एकही यावनी भाषेचा शब्द आलेला नाही हे एक वैशिष्टय आहे. मराठीचे आद्यकवि मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'चा प्रभाव या ग्रंथांत कांही ठिकाणी आढळतो. श्रीनृसिंहसरस्वतींचे आपण 'नामधारक' आहोंत असे सांगून हे चरित्र आपल्याला श्रीनृसिंहसरस्वतींचे संन्यासी शिष्य श्रीसिद्धसरस्वती यांनी सांगितले असे ते म्हणतात. हा ग्रंथ सिद्ध आणि नामधारक यांच्यांतील संवादरूपच आहे. श्रीनृसिंहसरस्वतींच्या जीवनांतील घटना मांडणे एवढेच या ग्रंथाचे प्रयोजन नाही तर त्यांनी पुनरुज्जीवित केलेल्या वैदिक धर्माची शिकवण, आचार आणि संस्कार यांचीही सविस्तर मांडणी त्यांत केली आहे. सरस्वती गंगाधरांचा वेद, स्मृती आणि पुराणे यांचा सखोल व्यासंग त्यांतून स्पष्टपणे दृग्गोचर होतो. हा ग्रंथ पुराणाच्या धाटणीने लिहिला आहे. आख्याने आणि उपाख्याने यांचे प्रसंगाने निवेदन आहे आणि त्यांतून मुख्यतः वर्णाश्रमधर्माची मूलतत्त्वे, उपासनापद्धति आणि आचार यांचे प्रतिपादन आहे. दत्तसंप्रदायाचे आणि त्यांतील श्रीगुरुभक्तीचे माहात्म्य विशेषत्वाने वर्णिले आहे. सरस्वती गंगाधरांची ओंवी बऱ्याच वेळां गद्यप्राय वाटते

आणि शब्दांचे लालित्य हे तिचे वैशिष्ट्य नाही. पण प्रसंगोचित साहित्यांतील नवरसांचा आविष्कार त्यांत आहे तसेच अर्थालंकारांचीही समर्पक योजना केलेली आहे.

अर्थात साहित्यगुणांळे हा ग्रंथ लोकप्रिय झाला असे नाही. ह्या ग्रंथांची प्रासादिकता - ईश्वराचा प्रसाद प्राप्त करून देण्याची क्षमता, विलक्षण आहे. प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आपल्या द्विसाहस्री ग्रंथाच्या उपसंहारांत या ग्रंथाचे वर्णन असे करतात. **'तत्संवादमयं ग्रंथं धर्म्यं गंगाधरात्मजः। सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत् तारकं सुधीः। यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूतरक्षामुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः। सप्ताहं तत्पाठिते शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति।।(२३ः११६-११७)** सिद्धमुनी आणि सरस्वती यांच्या संवादात्मक हा ग्रंथ जिथे कुठे नुसता ठेवलेला असला तरी भूत-प्रेत-पिशाचादि दुष्ट शक्तींचा नाश करतो. याचें सप्ताह पठण किंवा श्रवणही केले असतां दत्तात्रेय भगवान अभीष्ट कामना पुरवतात. इ.स. १४३८ च्या आसपास सिद्ध झालेल्या ह्या ग्रंथाची पारायणे असंख्य भक्तांनी करून आपले इष्ट प्राप्त करून घेतले आहे. आणि आजही करीत आहेत. साहजिकच दत्तसंप्रदायांत या ग्रंथाला वेदतुल्य मान आहे. ह्या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी वेदमंत्र उद्धृत केले असल्याने मुंज झालेल्या ब्राह्मणालाच हा वाचतां येतो. पण इतरांना हा ऐकतां येतो. स्त्रियांना हा ग्रंथ पठण करतां येत नाही; पण त्यांना तो ऐकतां येतो. या ग्रंथाला प्रदक्षिणा घालूनही याच्या प्रसादाचा लाभ अनेक स्त्रियांनी घेतला आहे आणि घेत आहेत.

### प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती यांचा पहिला ग्रंथ.

कदाचित् याच कारणामुळे ह्या ग्रंथांतील लौकिक आशयाकडे दुर्लक्ष झाले असावे. केवळ साहित्यकृती म्हणून किंवा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून याचे समीक्षण अलीकडेच झाले आहे. अर्वाचीन (१८५४ - १९१४) दत्तावतार मानले जाणारे महान संत प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांनी या ग्रंथावर संस्कृत आणि प्राकृत रचना करून त्यांतील धार्मिक प्रतिपादनांचे, तात्त्विक प्रमेयांचे आणि श्रीगुरूंच्या लीलांचे विवरण केले आहे. त्यांतून या ग्रंथाचे

वैदिक संप्रदायाशी असलेले दृढ नाते स्पष्ट करून त्याचे श्रुति-स्मृति-पुराणांच्या परंपरेतील स्थान विशद केले आहे. तसेच भागवत संप्रदाय आणि श्रीमच्छंकराचार्यांचा अद्वैत संप्रदाय यांच्याशी असलेल्या दत्तसंप्रदायाच्या अतूट संबंधाचेही दिग्दर्शन केले आहे.

या ग्रंथांपैकी सर्वांत प्रथम झालेला ग्रंथ म्हणजेच 'श्रीगुरुचरितम्'. माणगांवला असतांना (इ.स. १८८४) श्रीदत्तप्रभूंची श्रीवासुदेवशास्त्रींना (प.प. टेंबे स्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमींचे नांव) संस्कृतमध्ये गुरुचरित्र लिहिण्याची दत्तप्रभूंची आज्ञा झाली. त्या वेळी शास्त्रीबुवांचे संस्कृत अध्ययन माणगांवांतच अगदी जुजबी झाले होते. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे संस्कृत भाषांतर आपल्याला कसें जमणार?' असा विचार बुवांच्या मनांत आलाही; पण 'लिहायला आरंभ करा,' अशी दत्तप्रभूंची आज्ञा झाली. आश्चर्य म्हणजे ग्रंथ अवघ्या बारा दिवसांत लिहूनही झाला. ह्या ग्रंथाचे लेखन चालू असतांना शास्त्रीबुवांचे एक भक्त सावंतवाडीचे नारोपंत यांनी ते लेखन पाहिले. ते बुवांपेक्षा वयाने वडील असून त्यांनी बुवांना लहानपणापासून पाहिले होते. त्यांनी बुवांना विचारले की, 'बुवा! तुमचे संस्कृतचे फारसे अध्ययन नसतांनाही ही संस्कृत काव्यरचना कशी करूं शकतां?' त्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, 'मी कुठे हा ग्रंथ लिहितो? मला जशी अक्षरे दिसतात तशींच मी कागदावर उतरून काढतो.' यावरून सहजच असे अनुमान निघते की हा ग्रंथ अपौरुषेय असून श्रीस्वामीमहाराज हे त्याचे द्रष्टे आहेत.

वर सांगितल्याप्रमाणे अवघ्या बारा दिवसांत ग्रंथ पूर्ण झाल्यावर शास्त्रीबुवांच्या कानांवर 'संहितेयं द्विसाहस्री' असे श्रीदत्तगुरूंचे शब्द कानांवर पडले. तेव्हां कुतूहलाने ग्रंथाचे श्लोक मोजून पाहतां ती संख्या दोन हजारांपेक्षां बरीच कमी भरली. 'श्रीदत्तप्रभूंचे सांगणे कसे चुकेल?' असा विचार करून बुवांनी दुर्गासप्तशतीच्या गणनेप्रमाणे अर्धश्लोक, उवाच हेही त्यांत मोजल्यावर संख्या बरोबर दोन हजार भरली. तेव्हांपासूनच या ग्रंथाला 'द्विसाहस्री' या नांवानेच सर्व ओळखूं लागले. हा ग्रंथ मंत्रात्मक असल्याची ती साक्षच होती. नंतर तो ग्रंथ वाचून पाहतांना बुवांना त्यांत व्याकरणाचे वगैरे

कांही दोष वाटले म्हणून ते दुरुस्त करण्यासाठी लेखणी उचलली तेव्हां, 'हे झाले आहे तसेच मला आवडले आहे. त्यांत बदल करू नये. शिवाय अन्य व्याकरणानुसार (पाणिनीव्यतिरिक्त) ते शुद्धच आहे.' अशी स्पष्ट आज्ञा झाली. तेव्हां महाराजांनी तो ग्रंथ तसाच ठेवला. या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी प्राचीन चांद्र व्याकरणाचे प्रयोग आढळतात. दत्तप्रभूंनी ते मान्य केल्याने साहजिकच हे आर्ष प्रयोग ठरतात.

अर्थात श्रीगुरुचरित्राच्या तुलनेत हे संक्षिप्त भाषांतर काव्यगुणांत खूप सरस आहे. विविध वृत्तांतून रसपोष करण्याची श्रीस्वामिमहाराजांची हातोटी विलक्षण आहे. यमक, प्रास (उदा. शिष्टं कुष्टं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः।) आदि शब्दालंकार विपुल आहेत. भक्ति किंवा शांत रस हा जरी प्रधान रस असला तरी प्रसंगानुसार करुण, हास्य आदि रसांचीही योजना केली आहे. बावीसाव्या अध्यायांत शेत कापणाऱ्या पतीला अडविणाऱ्या स्त्रीला तो मारायला धावतो तेव्हां ती पळतांना तिच्या पायांखालची माती केसांचे चूर्ण झाली (निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत्।।) असे विनोदी चित्र ते उभे करतात. सोळाव्या अध्यायांतील सावित्रीच्या विलापांतील करुणरस हृदयस्पर्शी आहे. बऱ्याच ठिकाणी अर्थांतरन्यासांतून सुभाषिते पेरण्याचे कौशल्य दिसून येते. उदा. 'लोकाः स्वकर्मसूत्रोथा वृथाहंकारसंश्रिताः।।', 'मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भिषजे गुरौ यादृशी भावना यस्य सिद्धिस्तु तादृशी।।', 'लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः' इत्यादि.

## द्विसाहस्रीची रचना.

मूळ गुरुचरित्रांत ५२ अध्याय (अवतरणिका धरून) व ७३०० हून अधिक श्लोक आहेत. द्विसाहस्रीत तेवीस अध्याय आहेत. अर्थात संस्कृत भाषेच्या वैशिष्ट्यामुळें कमीत कमी शब्दांत अधिकांत अधिक आशय मांडण्यांत श्रीस्वामी महाराज यशस्वी झाले आहेत. त्यांनी एकाक्षरी कोशाचाही सढळ हाताने उपयोग केलेला दिसतो. यांतही चौथ्या अध्यायांत मूळ गुरुचरित्रांत नसलेला यदु, प्रल्हाद आणि कार्तवीर्य यांना केलेला उपदेश आहे. श्रीस्वामीहाराज

स्वतःच या अध्यायाला 'क्षेपक' अध्याय म्हणतात. या तेवीस अध्यायांखेरीज द्विसाहस्रींत आरंभीं १११ श्लोकांची श्रीगुरुस्तुति आहे. मूळ गुरुचरित्रात दत्तात्रेय देवतेचे स्वरूप, त्यांच्या उपासनापद्धति आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये ह्यांचा फारसा विचार केलेला नाही. ह्या प्रकरणांत श्रीमहाराजांनी दत्तात्रेय, त्यांचे स्वरूप, त्यांची उपासना, त्यांची सर्वसुलभता इत्यादींचे विवरण केले आहे. ग्रंथाच्या शेवटी दत्तसंप्रदायाचे वैशिष्ट्य मानल्या गेलेल्या अष्टांगयोगाच्या दिग्दर्शनासाठी योगरहस्य, तसेच शांकर अद्वैताच्या मांडणीसाठी बोधरहस्य ही दोन प्रकरणे जोडली आहेत. ही द्विसाहस्रीची रचना दुर्गासप्तशतीच्या रचनेसारखीच आहे. वर निर्देश केल्याप्रमाणे गणना करितां सातशें श्लोक आणि तीन रहस्ये दुर्गासप्तशतीत दिसून येतात.

## त्रिकांडात्मक रचना

वैदिक परंपरेला अनुसरून भगवद्गीतेप्रमाणे गुरुचरित्राचीही रचना ज्ञान, कर्म आणि उपासना अशी त्रिकांडात्मक आहे हे श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्रीची रचना तशी केल्यावरच इतर अभ्यासकांच्या ध्यानांत आले. श्रीमहाराज टीकेच्या समारोपांत स्वतःच म्हणतात, **'ज्ञानं त्रयोदशाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः। पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट्।।'** पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोग, नंतरच्या पांच अध्यायांत कर्मयोग आणि शेवटच्या पांच अध्यायांत भक्तियोग अशी रचना योगिराज दत्तप्रभूंनी करविली. यानुसार श्रीगुरुचरित्राची रचना पाहतां अध्याय २४ पर्यंत ज्ञानकांड, ३७ पर्यंत कर्मकांड आणि ५१ पर्यंत भक्तिकांड अशी होते. श्रीगुरुसंहिता (समश्लोकी) या आपल्या ग्रंथांत श्रीस्वामीमहाराजांनी अशीच योजना केली आहे.

## द्विसाहस्रीची टीका.

मूळ द्विसाहस्री वर सांगितल्याप्रमाणे गृहस्थाश्रमांत इ.स. १८८४ त लिहून झाली. १८९१ साली पत्नीच्या मृत्यूनंतर वयाच्या ३५ व्या वर्षी गंगाखेड येथे वासुदेवशास्त्रींनी संन्यास घेतला. १८९८ साली चिखलदा येथे आठवा चातुर्मास

करून श्रीस्वामीमहाराज प्रभासपट्टण येथे आले असतां त्यांना दत्तप्रभूंची द्विसाहस्रीवर टीका लिहिण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे पंधरा वर्षांनंतर आपल्या ग्रंथावर स्वामीमहाराजांनी स्वतःच टीका (याला स्वोपज्ञ टीका म्हणतात) लिहिण्यास आरंभ केला. मूळ ग्रंथ या वेळी समोर नव्हता. तरी केवळ स्मरण करूनच या टीकेचे लेखन झाले हे विशेष होय. ही टीका द्वारकेत श्रीमहाराजांच्या आठव्या चातुर्मासांत पूर्ण झाली. यासंबंधी प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात, 'समष्ट्यात्मक भगवत्स्वरूपाशी संलग्न झालेल्या सत्पुरुषांच्या विशालबुद्धीला अगम्य असें कांहीच नाही.' श्रीस्वामीमहाराजांनीच लिहिले आहे कीं नऊ अध्यायांची टीका प्रभास क्षेत्रांत झाली व शेष सर्व अध्यायांची द्वारकेंत झाली. **(पाश्चात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताखिलानां। श्रीद्वारकायां चरितस्य तस्य सद्गुरोर्वेदनुतस्य तस्य।।)** टीकेनंतर या ग्रंथांची चूर्णिका म्हणजे सरल गद्य अनुवादही द्वारकेतच झाला.

**पदच्छेदः पदार्थोक्ति विग्रहो वाक्ययोजना, आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् ।।** या उक्तीप्रमाणे वाक्याची पदें पाडणे, त्यांचा अर्थ सांगणे, संधी सोडवणे, वाक्याचा अर्थ लावणे आणि आक्षेपांचे समाधान करणे ही व्याख्यानाची (टीकेची) पांच लक्षणे आहेत. पण श्रीस्वामीमहाराजांची टीका यांच्याही पुढे जाऊन स्वतंत्र मताचे प्रतिपादनही करते. त्यामुळे ती भाष्य या संज्ञेला पात्र ठरते. **(सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुसारिभिः। स्वपदानि च वर्ण्यते भाष्यं भाष्यविदो विदुः)** ह्या टीकेच्या माध्यमांतून श्रीस्वामी महाराजांनी श्रीगुरुचरित्राचे सिद्धांत स्पष्ट करून त्यांची श्रुति-स्मृति-पुराणांशीं संगति दर्शविली आहे. तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा (वेदांत) या षड्दर्शनांच्या, आणि गुरुचरित्रांतील प्रमेयांची एकवाक्यता विशद केली आहे. गीता-भागवत या ग्रंथांतीलच तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन गुरुचरित्रांत कसे अनुस्यूत आहे तेही स्पष्ट केले आहे. पर्यायाने श्रीदत्तसंप्रदाय हा कसा भागवतसंप्रदायांतच अंतर्भूत आहे तेही दर्शविले आहे. गुरुचरित्रांतील वेदांत हा श्रीमच्छंकराचार्यांच्या अद्वैतमताला कसा अनुसरून आहे हेही श्रीस्वामीमहाराजांनी विशद केले आहे. अर्थातच ही टीका लिहितांना वेदशास्त्रादि १७०हून

अधिक ग्रंथाचे संदर्भ उद्धरणासहित दिलेले आहेत. हे केवळ स्मरणशक्तीच्या आधारेच दिलेले आहेत. 'मूळ गुरुचरित्रांत नसलेले कांही विषय द्विसाहस्रींत आल्याचे वर आपण पाहिलेच आहे. असेच अनेक विषय टीकेंतही श्रीस्वामीमहाराजांनी हाताळलेले आहेत. श्रीगुरुचरण 'प.पू.गुळवणीमहाराजां'नी यांतील कांही उदाहरणे दिली आहेत. 'माया कां मानावी? ईश्वर पक्षपाती आहे काय? जगाचे अस्तित्व व नास्तित्व हे अध्यारोपापवादात्मक कसे आहे? कर्माचा ज्ञानाला कसा उपयोग होतो? कर्माचरण कसे केले असतां चित्त शुद्ध होते? ईश्वरावतारांचे स्वरूप काय व ते कसे होतात? ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांतच गेले पाहिजे किंवा एकदम संन्यासाश्रमांत जातां येईल? संन्यासाश्रम घेतल्यावर शिष्यप्रशिष्यपरंपरा कां चालूं ठेवावी? जीवन्मुक्ताची आंतरस्थिति कशी असते? तीर्थयात्रा कां करावी? सद्गुरुसेवा सर्वांनीच कां करावी? शरीरांतून जीव जातो कां प्राणवायु जातो, शरीरस्थिति मुख्यतः कोणावर अवलंबून आहे? अविद्येपासून उत्पन्न झालेले कर्म तीच अविद्या घालविण्यास कसे कारणीभूत होते? ब्रह्मज्ञानी पुरुषाने कर्म टाकावे काय? एकाच जन्मांत सर्व कर्मफलांचा भोग संपवून मुक्त होणे शक्य आहे काय? पतिपत्नीसंबंध, गुरुशिष्यसंबंध, स्वामिसेवकसंबंध इत्यादि कसे निर्माण होतात व ते कसे दूर होतात? बंधक असलेली काम्यकर्मे वेदांत कां सांगितली? मनुष्य, पितर, देव यांची कालगणना कशी करावी? चंद्रकलांचे स्वरूप काय? गायत्री मंत्राचा अर्थ काय? त्या मंत्राचे इतके महत्त्व कां? आपत्कालांत कसे वागावे? मुख्य ज्ञानयोग व त्याचे साधन कर्मयोग यापेक्षां तिसरा भक्तियोग कशाला पाहिजे? भगवंताकडूनच वेदाज्ञेचे उल्लंघन झाल्यास तें योग्य कां अयोग्य? साकाराच्या भक्तीने मोक्ष कसा मिळेल? शूद्र हा श्रौतविद्येचा अधिकारी आहे कीं नाही? त्याला मुक्ति कशी मिळेल? रोगादि दुःखांचे खरें कारण कोणतें व त्यांचा परिहार कसा होऊं शकेल?'

अशा रीतीने द्विसाहस्री ह्या ग्रंथांत दत्तसंप्रदायाच्या तात्त्विक बैठकीची सप्रमाण संस्थापना झाली आहे. त्याचप्रमाणे दत्तोपासनेच्या विविध परिमाणांचे सूत्रात्मक दिग्दर्शनही आहे. ह्या ग्रंथांत प्रतिपादलेल्या मूलतत्त्वांचाच विस्तार

श्रीमहाराजांनी आपल्या विशाल वाङ्मयांत पुढे केलेला कुणाही विचक्षण वाचकाला दिसून येईल.

## फलश्रुति.

श्रीगुरुचरित्राची प्रासादिकता आपण वर पाहिलीच आहे. श्रीस्वामीमहाराजांच्यासारख्या अवतारी महात्म्याने श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच केलेल्या ह्या त्याच्या संस्कृत रूपांतरांतही ती प्रासादिकता उतरली असल्यास नवल नाही. ग्रंथाच्या समारोपांत महाराजश्री म्हणतात, ' **स एवात्रेयगोत्रोत्थगणेशब्रह्मपुत्रगाः। पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रंथात्मा तारकोऽव्ययः।।** ' तोच (सरस्वती गंगाधरलिखित) श्रीगुरुचरित्रग्रंथरूपी तारक आणि अव्यय दत्तात्रेय अत्रिगोत्रोत्पन्न गणेशब्राह्मणाच्या पुत्राची वाणी पावन करीत इथे विराजत आहे. श्रीगुरुचरित्राच्या पठणाने वा श्रवणाने होणाऱ्या ऐहिक आणि आमुष्मिक कल्याणाचीच ही ग्वाही आहे. त्यानुसार अनेक दत्तभक्त या ग्रंथाची उपासना करून आपले जीवन कृतार्थ करीत आहेत. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतींच्या प्रश्नावलीत या ग्रंथाची फलश्रुति अशी सांगितली आहे.

**देईल तो इष्टसिद्धी वासुदेव यतीश्वर। 'द्विसाहस्री' गुरुकथा सप्ताहें दूर हो दर।।**

श्रीगुरुचरित्राप्रमाणेच या ग्रंथाचेही सप्ताह करून इष्टसिद्धि पावणारे हजारों दत्तभक्त आजही आहेत. 'केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे।' या समर्थोक्तीनुसार हा श्रद्धेचा आणि अनुभवाचा विषय आहे.

## द्विसाहस्रीची हवनीयता.

ह्या ग्रंथाला 'द्विसाहस्री संहिता' असे नांव देतांना दत्तप्रभूंनीच हा सामान्य ग्रंथ नसून मंत्रमय संहिता आहे असा संकेत दिलेला दिसतो. अर्थात् त्याकडे श्रीमहाराजांनी (बहुतेक हेतुपुरःसर) दुर्लक्ष केले. यांत त्यांचे अमानित्वच दिसून होते. हे सगळे मान्य करणे म्हणजे स्वतःकडे ऋषित्व घेणे ठरले असते. श्रीमहाराजांच्याकडून ह्या ग्रंथाच्या हवनाचा पुरस्कार होत नाही हे पाहूनच बहुधा दत्तप्रभूंनी महाराजांचे सावंतवाडीचे ऋणानुबंधी व शिष्य आणि महान्

दत्तभक्त श्री. नारोपंत उकिडवे यांना स्वप्नदृष्टांतांत संस्कृत गुरुचरित्राचा स्वाहाकार करण्याची आज्ञा केली. नारोपंतांनी आपली आर्थिक अडचण दत्तप्रभूंना निवेदन केली. तेव्हां त्यांनी पैशांची व्यवस्था कुणाकडून होईल ते सांगितले व त्या गृहस्थांनी स्वाहाकाराचा सर्व खर्च करण्याची तयारीही दाखविली. एवढ्यांत सावंतवाडीत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. पुन्हां नारोपंतांना स्वप्न झाले की 'प्लेग थांबेल, तुम्ही स्वाहाकाराची तयारी करा.' नारोपंतानी ही स्वप्नांत झालेली आज्ञा त्यावेळी पवनीस चातुर्मासानिमित्त असलेल्या श्रीस्वामीमहाराजांना कळविली. त्यावेळचे श्रीस्वामिमहाराजांचे पत्र असे आहे.(अ.श्रावण शु।।७, शके १८३१).

'रा.रा.नारायण उकिडवे सावंतवाडी यांस नारायण. हल्ली विजयवाड्यातून आपले पूर्वी पाठविलेले पत्र पोचले. जे स्वप्न झाले ते सद्गुरूंनी दाखविले. मंत्रशास्त्रांत मनुष्यांनी केले अनार्ष ग्रंथ यांचे अनुष्ठान करूं नये असे आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्याचा कोणी सांगावा व हा ग्रंथ मी केला असाही अभिमान. श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो, पण स्वाहाकार करा असे अनुमोदन द्यावे अशी प्रवृत्ती होत नाही. गुरुचरित्र स्वाहाकाराविषयी स्वतः निराधार. कांहीच सांगतां येत नाही. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कांही अप्रामाणिक बोलतां येत नाही. कळावे. नारायण.'

ह्या पत्राचा विचार करतां कांही गोष्टी स्पष्ट होतात. मुख्य म्हणजे नारोपंतांना झालेला दृष्टांत दत्तप्रभूंनीच दिलेला आहे ह्याला श्रीस्वामीमहाराजांनी दुजोरा दिला आहे. मानवनिर्मित अनार्ष ग्रंथांचा स्वाहाकार करण्याबद्दल साशंकता प्रकट केली आहे. तसेच गुरुचरित्राचा स्वाहाकार नव्यानेच करण्याचा प्रस्ताव असल्याने त्याला आधीचे कांही प्रमाण वा आधार नाहीत. त्यामुळे ह्याविषयी कांही सांगण्यास आपण असमर्थ आहो असा अभिप्राय दिसतो. हा ग्रंथ आपणच केला असल्याने अभिमानाची भीतीही श्रीस्वामीमहाराजांना वाटली आहे. इतके असूनही ह्या पत्रांत हे हवन करूं नका असे निक्षून न म्हणता 'श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो.' असे म्हटले आहे. ह्या हवनाला संमति देण्याची मात्र श्रीमहाराजांच्या मनाची तयारी नव्हती. श्रीगुरुचरित्राच्या हवनाचा आत्यंतिक निषेध ह्या पत्रांत आढळत

नाही. अनार्ष ग्रंथाच्या अनुष्ठानाच्या निषेधाबद्दलही त्यांनी मंत्रशास्त्राचा हवाला दिला आहे. इथे हे विचारणीय आहे की श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वीपासूनच दुर्गासप्तशती, भागवतपुराण इत्यादी ग्रंथांचे हवन प्रचलित होते. त्याचा श्रीस्वामीमहाराजांनी निषेध केल्याचे ऐकीवांत नाही.

विशेष गोष्ट अशी आहे की आपल्या सद्गुरूंचे हे पत्र आल्यावर नारोपंतांनी हवनाचा विचार सोडून दिला. तरीही भगवान दत्तात्रेयांनी त्यांना पुन्हां स्वप्नद्वारा आज्ञा केली कीं, 'ज्योतीपंतांनी भागवताचा स्वाहाकार केला तसा तू संस्कृत गुरुचरित्राचा कर.' ह्या दृष्टांतांत खरे तर श्रीस्वामीमहाराजांच्या आक्षेपाचे स्पष्ट उत्तर होते. तसेच देवता, निर्वाप, हवनप्रकार यांचीही सूचना होती. नारोपंतांच्या अनन्य गुरुभक्तीचे खरेच कौतुक करायला हवे की वारंवार दत्ताज्ञा होऊनही त्यांनी पुन्हां श्रीस्वामीमहाराजांना पत्रद्वारे विचारणा केली. अपेक्षेप्रमाणे पुन्हा सद्गुरूंचे नकारात्मक पत्र आले. त्यांत 'तुम्हांला कांही कर्तव्य असल्यास १० पारायणे करून ब्राह्मणभोजन घाला.' अशी आज्ञा झाली. कांही अनुष्ठानच न करण्याच्या पूर्वीच्या भूमिकेत पडलेला हा फरक लक्षणीय आहे.

गेल्या ३०-४० वर्षांत द्विसाहस्रीसह श्रीस्वामीमहाराजांच्या अनेक ग्रंथांची हवने त्यांच्या संप्रदायांतील भक्तांनी आयोजित केली आहेत. ह्यापैकी नारेश्वरवासी संत पू. श्रीरंग अवधूत महाराजांच्या शिष्यांचा विशेष पुढाकार दिसतो. तेथील प्रमुख विश्वस्त व श्री. प.प. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. हरिप्रसाद (धीरुभाई) जोशी यांच्या पत्रानुसार द्विसाहस्री गुरुचरित्राचा पहिला स्वाहाकार भरूच येथे त्यांचे पिताश्री व श्रीरंगअवधूतांचे अंतरंग शिष्य पू. श्री शिवप्रसाद जोशी यांच्या पुढाकाराने झाला. हा स्वाहाकार करावा किंवा नाही असा प्रश्न श्रीस्वामीमहाराजांना विचारून प्रार्थनापूर्वक चिठ्ठ्या टाकण्यांत आल्या. त्यांचा होकारार्थी कौल मिळाल्याने स्वाहाकार करण्यांत आला. पू. शिवप्रसाद हे प्रसिद्ध कर्मकांडी असल्याने त्यांनी केलेल्या विधानानुसार हा स्वाहाकार झाला. श्रीदत्तप्रभूंच्या अवतारांची संख्या लक्षांत घेऊन सोळा ऋत्विज हवनाला बसतात. 'द्रां दत्तात्रेयाय नमः' हा पल्लव

लावण्यात येतो. हविर्द्रव्य म्हणून त्रिमधुप्लुत पायसाचा प्रयोग केला जातो. यानंतर अनेक ठिकाणी या संहितेची हवने झाली आहेत. त्यांपैकीं कांहीत लेखकालाही सहभागी होण्याचे भाग्य लाभले आहे.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट आहे की हा ग्रंथ - नव्हे ही संहिता, श्रीदत्तप्रभूंच्या संकल्पानेच सिद्ध झालेली आहे. प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात त्याप्रमाणे हा श्रीदत्तराजांचा ग्रंथावतारच आहे आणि त्याचे 'श्रवण, मनन, निदिध्यासनरूपाने नित्य सेवन करणे' हे सर्व आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू साधकांच्या परमकल्याणाला कारणीभूत ठरणारे आहे. या ग्रंथाच्या मूळ संहितेची मराठी व हिंदी भाषांतरे उपलब्ध आहेत. पण टीकेचे भाषांतर उपलब्ध नव्हते. (अगदी अलीकडेच टीकेचेही एक मराठी भाषांतर पहाण्यांत आले आहे.) त्यासाठी या ग्रंथाचा तसेच टीकेचाही भावार्थ समजून घेण्याचा ह्या ग्रंथांत प्रयत्न केला आहे. प्रस्तुत लेखकाला त्याच्या सीमित क्षमतांची तीव्र जाणीव आहे. ह्या ग्रंथाचा यथार्थ बोध होण्यासाठी आवश्यक असलेली योग्यता लेखकांत अंशतःसुद्धां नाही. पण आपल्या शक्त्यनुसार जे व जेवढे समजेल ते सुबोध प्रकारे सांगण्याचा हा प्रयत्न आहे. निरूपण हा अध्ययनाचाच एक प्रकार आहे. ही त्या ग्रंथात्म्याची सेवाच आहे. सिद्ध ग्रंथांचे वाचन चित्तशुद्धिकारक असल्याने ते अनधिकार व्यक्तीचेही कल्याणच करते ह्या श्रद्धेने केलेले हे लेखन आहे. या प्रयत्नांतून आपल्या अंतःकरणांत त्यांतील आशय अंशतः उतरला तरी हा उद्यम सफल होईल अशी काकुळती आहे. प्रथम मूळ संहितेचे श्लोक देऊन त्यांचा अन्वय खाली दिला आहे. त्यानंतर श्लोक व श्रीस्वामिमहाराजांची टीका यांचा मराठी अनुवाद दिला आहे. कांही ठिकाणी श्रीमहाराजांनी केवळ संकेताने दर्शविलेले संदर्भ मोजक्या शब्दांत स्पष्ट करण्याचाही प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांच्या आशयाला धरूनच हा प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांनी दिलेले व्याकरणाचे संदर्भ मात्र वगळले आहेत. त्यामुळे भावार्थाच्या आकलनात काहीं त्रुटी जाणवणार नाही अशी आशा आहे. विद्वज्जनांना बऱ्याच ठिकाणी प्रस्तुत अनवादकाच्या ज्ञानाच्या मर्यादा दिसून येतील. त्यांनी उदार मनाने त्यांची उपेक्षा करून नीरक्षीरन्यायाने श्रीस्वामिमहाराजांचे प्रमेयरूपी सार ग्रहण

करावे अशी प्रार्थना आहे. वाक्सेवेद्वारे लेखक आणि वाचक उभयतांचेही कल्याण व्हावे हीच श्रीगुरुचरणीं प्रार्थना!

'द्विसाहस्री गुरुचरितम्' हा ग्रंथ प.पू. योगतपस्वी श्रीनारायणकाका ढेकणे महाराज यांच्या प्रेरणेने कार्यरत असलेल्या 'श्रीवासुदेवनिवास स्वाध्याय मंडळांत वाचला आणि चर्चिला गेला आहे. लेखकाला त्याचा बोध होण्यांत मंडळाच्या सदस्यांच्या योगदानाचे ऋण इथे नमूद करणे आवश्यक वाटते. ह्या स्वाध्याय मंडळाच्या माध्यमांतून हे निरूपण आपल्या गुरुपरंपरेला सादर केल्याचे समाधान आम्हांला लाभले आहे. २०१४ इ.स. च्या आषाढ शुक्ल प्रतिपदेला प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज यांची शंभरावी पुण्यतिथि येत आहे. सर्व भारतांत पुढील वर्ष 'समाधीशताब्दि' महोत्सव वर्ष म्हणून साजरे होत आहे. ह्या पर्वणीत हा ग्रंथ प्रकाशित होत आहे हा समष्टीचा एक शुभ संकेतच आहे. त्यांचे हे कार्य त्यांनीच सिद्धीला न्यावे अशी प्रार्थना करूं या.

या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना ते लिखाण श्रीनरसोबावाडीचे वे.मू.डॉ.बाळकृष्ण महादेव जमदग्नि यांच्या निदर्शनास आले. डॉ. जमदग्नि हे प.पू. वक्रतुंडबुवा यांनी सुरूं केलेल्या परंपरेनुसार वाडी येथे श्रीस्वारी(उत्सवमूर्ति)पुढे पुराणसेवा करीत असतात. हे लिखाण त्यांना आवडून त्यांनी ते श्रींच्यापुढे पुराणरूपाने वाचून दाखविले. हा मी भक्तवत्सल भक्ताभिमानी श्रीदत्तप्रभूंचा या लेखनसेवेला लाभलेला आशीर्वादच मानतो. डॉ.जमदग्नि यांनी, तसेच वल्लभविद्यानगर (आणंद) येथील प. पू. श्रीरंग अवधूत महाराजांचे शिष्य विद्वान, व्यासंगी व गुरुभक्त शास्त्री डॉ.जयेंद्रभाई दवे यांनीही ह्या लिखाणाचे परिशीलन करून, महत्त्वपूर्ण सूचना केल्या आहेत व माझा उत्साह आपल्या आत्मीयतेने वाढविला आहे. डॉ.जमदग्नि यांनी परिश्रमपूर्वक मुद्रितांच्या शोधनाचेही कार्य केले आहे. हे दोन्ही विद्वान् दत्तभक्त द्विसाहस्री संहितेचे 'उपजीवी' आहेत. त्यांच्या योगदानाने ह्या ग्रंथाचे मोल वाढले आहे.

ह्या ग्रंथाचे प्रकाशन प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा, श्री अवधूत निवास

ट्रस्ट, नारेश्वर,  आणि श्रीवासुदेवनिवास, पुणे या संस्थांच्या आर्थिक साह्यानेच शक्य झाले आहे. श्रीवासुदेवनिवासाचे प्रमुख विश्वस्त प.पू. पं. शरदभाऊ जोशी यांनी वेळोवेळी दिलेल्या उत्तेजनाचा आणि प्रकाशनासाठी घेतलेल्या पुढाकाराचा इथे विशेष उल्लेख केला पाहिजे. श्रीवासुदेवनिवासच्या विश्वस्तमंडळानेही ह्या कार्याला उत्तम प्रतिसाद दिला आहे. नारेश्वरच्या अवधूतनिवास ट्रस्टचे व प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. डॉ.हरिप्रसाद (धीरूभाई) शिवप्रसाद जोशी यांनी आत्मीयतेने केलेल्या मार्गदर्शनाचा आणि भरघोस साह्याचा प्रस्तुत लेखक सदैव ऋणी राहील. श्रीवासुदेव प्रबोधिनीचे सभासद आणि पदाधिकारी यांनी दहा वर्षे लेखकावर जो लोभ केला आहे त्याचाच हा ग्रंथ एक आविष्कार आहे. या सर्वांचा मी सदैव ऋणी राहीन. या संस्थांच्या आर्थिक सहकारानेच प.पू. योगिराज श्रीगुरुमहाराज यांनी घालून दिलेल्या पायंड्याप्रमाणे, जवळपास ७०० पृष्ठांच्या ह्या ग्रंथाचे मूल्य केवळ २००रु. ठेवणे शक्य झाले आहे.

मे.के.जोशी आणि कंपनी, पुणे हे श्रीवासुदेवनिवास, पुणे यांच्यशी दीर्घकाल संबंधित आहेत आणि भक्तपरिवारांपैकीं आहेत. त्यांनी नेहमीच्या आपुलकीने, तत्परतेने आणि कुशलतेने ह्या ग्रंथाचे उत्तम मुद्रण केल्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

यांत लेखक व वाचक या दोघांचाही लाभ होईल अशी अपेक्षा आहे. द्विसाहस्रीरूप ग्रंथात्म्याची ही सेवाच आहे. प.पू.सद्गुरु योगिराज श्रीगुळवणीमहाराजांनी ती मान्य करावी आणि आपल्या कृपेची साउली निरंतर आमच्यावर धरावी हीच प्रार्थना!

**वासुदेव व्यंकटेश देशमुख.**
ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ,
औंध, पुणे ४११००७. भाद्रपद शुक्ल ९, शके १९३५.

# प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी.

'नयन चेंबर्स', २रा मजला, पारकर वाडा, दांडिया बाजार, वडोदरा. दूरध्वनि- ०२६५-२४३१५६९
श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, एरंडवणे, कर्वे पथ, पुणे ४११००७. दूरध्वनि ०२०-२५४५५५८४

महान् दत्तावतारी संत प.प.श्री. वासुदेवानंदसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराज यांचे जीवन, कार्य आणि वाङ्मय यांचा प्रचार तसेच प्रसार करण्याच्या हेतूने, १९ ऑक्टोबर, २००२ कोजागिरी पौर्णिमेच्या के शुभ दिनी, श्रीमहाराजांचे पावन समाधिस्थान श्रीगरुडेश्वर येथे, भारतांतील प्रमुख श्रीदत्तसंस्थांच्या प्रतिनिधिनींनी प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनीची स्थापना केली. साठ वर्षांपूर्वी हैद्राबाद (आं.प्र) येथे श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दीच्या उत्सवांत त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचे प्रकाशन करीत असतां प.पू. योगिराज श्री. वामनरावजी गुळवणी महाराज यांनी अशा प्रकारची एक अखिल भारतीय संस्था असावी असा विचार व्यक्त केला होता. त्याच्या आधारेच या प्रबोधिनीची प्रमुख उद्दिष्टे निश्चित करण्यात आली. (१) प.प. थोरल्या महाराजांच्या समग्र ग्रंथांचे प्रकाशन. (२) ह्या ग्रंथांचे विविध भाषांत अनुवाद. (३) संगणक, इंटरनेट इत्यादि आधुनिक माध्यमांतून श्रीस्वामीमहाराजांच्या जीवन, कार्य आणि साहित्य यांचा प्रसार. (४) श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचे अध्ययन आणि संशोधन यांचा विद्यापीठे आणि महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत व्हावा असा प्रयत्न करून, त्या त्या संस्थांना आवश्यक सहकार्य देणे. (५) ह्या प्रबोधिनीत अधिकाधिक श्रीदत्त संस्थानांना समाविष्ट करून श्रीस्वामीमहाराजांच्या साहित्याचे प्रकाशन, प्रचार व वितरण यांकरिता त्यांचे साह्य मिळविणे. ह्या सर्व संस्थांना एका सौहार्दपूर्ण सूत्रांत गठित करून श्रीदत्तसंप्रदायाच्या विकासासाठी कार्यान्वित करणे. (६) श्रीस्वामीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल झाला आहे. ज्या स्थानांत महाराजश्रींचा निवास झाला - विशेषतः त्यांचे चातुर्मास जिथे जिथे संपन्न झाले, त्या स्थानांत त्यांचे स्मारक निर्माण

करून  नित्य पूजा तसेच महाराजांच्या वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रचाराची सोय करणे.

आज अकरा वर्षानंतर या प्रबोधिनीच्या कार्याची फळे दृग्गोचर होत आहेत. प.प.श्रीटेंबे स्वामी महाराजांचे उपलब्ध सर्व मराठी व संस्कृत ग्रंथ आतां प्रबोधिनीच्या संलग्न संस्थांतून उपलब्ध आहेत. तसेच ते www.shrivasudevanandsaraswati.org या इंटरनेट स्थळावरही उपलब्ध आहेत. श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे मराठी व गुजराती अनुवाद पूर्वीपासूनच उपलब्ध आहेत. आतां द्विसाहस्री, दत्तमाहात्म्य व पंचपाक्षिक या ग्रंथांचे हिन्दी अनुवाद प्रकाशित झाले आहेत. श्रीस्वामिमहाराजांच्या प्रमुख संस्कृत ग्रंथांची तेलुगु आणि कानडी लिपीतील संस्करणे निघाली आहेत. अधिकाधिक भाषांतून श्रीमहाराजांच्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठी प्रबोधिनी प्रयत्नशील आहे. सांप्रतच्या श्रीस्वामींच्या समाधिशताब्दि वर्षात भारतभर विशेष कार्यक्रमांचे आयोजन होत आहे.

प्रबोधिनीच्या ह्या पुण्यकार्यांत सर्व स्वामिभक्तांनी आणि दत्तभक्तांनी सहभागी व्हावे अशी विनंति या निवेदनाद्वारे आम्ही करीत आहो. यथाशक्ति द्रव्यसेवा, वाङ्मयीन सेवा, सामूहिक तसेच वैयक्तिक उपासना इत्यादि प्रकारे या देवकार्यांत योगदान करावे. अकरा हजार किंवा अधिक रकमेचे दान देणाऱ्यांना प्रबोधिनीचे आश्रयदाता होतां येते. तसेच पांचशे रुपये देणाऱ्यांना आजीव सदस्यत्व मिळते. उदार आणि सत्प्रवृत्त दत्तभक्तांना आवाहन आहे की प.प.श्रीस्वामीमहाराजांच्या दत्तसमर्पित जीवनांतून प्रवाहित झालेल्या ह्या दत्तभक्तीच्या पावन गंगेत अधिकतम योगदान करून परमश्रेय साधून घ्यावे.

**प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीविरचितं**

**श्रीगुरुचरितम्। सटीक मराठी भाषांतर.**

# अनुक्रमणिका.

(विषयांपुढील कंसांतील आंकडे श्लोकांचे आहेत)

## श्रीगुरुस्तुतिः। : १-३३ :



## ज्ञानयोगः।

### प्रथमोऽध्यायः। चरितानुसंधानम्। : ३४-६२ :

## द्वितीयोऽध्यायः। गुरुशिष्यचरितानुकथनम्। : ६३-८० :

नामधारकाची सिद्धमुनीशी भेट व संवाद (१-६) : सद्गुरूंचे माहात्म्य व संशयाचा भक्तीला अडसर (७-१०) : युगनिरूपण आणि कलीला ब्रह्मदेवाचा उपदेश (११-२१) : दीपकाची गुरुसेवा (२२-४७) : दीपकाला विष्णूंचे वरदान आणि त्याच्यावर गुरूंची कृपा (४८-५७) : दीपकाख्यानाचा समारोप (५८-६३).

## तृतीयोऽध्यायः। दत्तावतारकथनम्। : ८१-१०१ :

गुरुकथा भवसागरांतील नौका (१-७): अत्रि आणि अनसूया (८-१३) : नारदकृत अनसूयास्तवनाने रुष्ट देवींच्या शांतवनासाठी ब्रह्मा, विष्णु आणि महेश अत्रिऋषींच्या आश्रमांत (१४-१६) : अनसूयेच्या पातिव्रत्यप्रभावाने तिन्ही देवांना बालकत्व.(१७-२४) : अनसूयेच्या दुधाने तीनही देवांची तृप्ती.(२५- ३०) : अत्रिऋषीकृत स्तुति.(३१-३४) : तिघांचे अत्रि आणि अनसूया यांना वरदान आणि तिघांचे नामकरण. (३५-४१) : अंबरीषाची कथा. (४२-५७).

## चतुर्थोऽध्यायः। दत्तलीलाकथनम्।  : १०२-१४३ :

श्रीदत्त-यदुसंवाद 'अवधूतगीता'. (१-४०) : प्रह्लादावर अनुग्रह. (४१-४४) : कार्तवीर्याला अष्टांगयोग आणि आत्मज्ञान यांचा उपदेश. (४५-५७).

## पञ्चमोऽध्यायः। श्रीपादावतारः। : १४४-१५९

उपोद्घात (१-२) : परमेश्वर पक्षपाती आहे कां?(२-४) : सुमतिब्राह्मणीला पुत्रप्राप्तीचे वरदान (५-१४) : श्रीपादांचा जन्म (१५-२१) : श्रीपादश्रीवल्लभांचा मातेला उपदेश आणि गृहत्याग (२२-२५) : दोन्ही भावांच्या व्यंगांचा परिहार.(२६-२७) : मातेला स्वरूपदर्शन, (२७-३२) बंधूना उपदेश, काशीला प्रयाण. (३३-३६).

## षष्ठोऽध्यायः। गोकर्णवर्णनम्। : १६०-१७४

मातेसाठी रावणाचा कैलास आणण्याचा उद्यम.(१-५) : रावणाच्या संगीतसेवेने शंकराकडून प्राणलिंगाचे दान.(६-१२) : रावणाला फसवून गोकर्णांत लिंगाची स्थापना.(१३-३१) : मित्रसह राजाची कथा.(३२-३७) : चंडालीचे आख्यान.(३८-५१) : गोकर्णमाहात्म्य.(५२-५४).

## सप्तमोऽध्यायः। श्रीपादमहिमावर्णनम्। : १७५-१८७

विद्वान् ब्राह्मणाच्या मंदमति मुलाची कथा (१-११) : शनिप्रदोषाचे आख्यान (१२-२७) : अंबिकेच्या पुत्राला वरदानाने सुविद्य केले.(२८-३०): अंबिकेच्या प्रदोषव्रताचे फल देण्यासाठी पुनरावतार (३१-३६): ब्राह्मण व्यापारी भक्ताचे चोरांपासून रक्षण (३७-४७): कुरुगड्डीचे आणि श्रीपादश्रीवल्लभांच्या भक्तीचे माहात्म्य (४८-५०).

## अष्टमोऽध्यायः। श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनम्। : १८८-२१५

अंबिकेचा पुनर्जन्म आणि माधवब्राह्मणाशी विवाह.(१-६) : धर्माला अनुकूल कामाचे अनिंद्यत्व (७) : नृसिंहसरस्वतींचा अवतार, जन्मतः ॐकाराचा उच्चार (८-१५): बाल्यावस्थेतील चमत्कार आणि लीलेने मूक राहणे.(१६-२१): लोहाचे सोने करून मुंज लावण्याचा मातापित्यांना संकेत.(२१-२४) : उपनयनानंतर लगेच वेदपठण (२५-२६) : संन्यासाठी आईवडिलांच्या अनुज्ञेची मागणी (२७-२९) : दुःखी मातेला उपदेश.(३०-४१) : मातेला आपल्या स्वरूपाचे दर्शन, पुत्रप्राप्तीचे वरदान; मातेने केलेली स्तुति.(४२-४५) : मातेच्या इच्छेनुसार एक वर्ष घरी राहून शिष्यांना अध्यापन.(४६-४७) : आईला जुळे झाल्यावर काशीला प्रयाण (४८-५२) : काशीतील तपाचरण आणि तेथील संन्याशांची प्रार्थना (५३-५७) : कृष्णसरस्वतींकडून संन्यास घेऊन संन्यासमार्गाचा प्रसार.(५८-६०) : महावाक्यांसहित संन्यासधर्माचा आणि योगाचाउपदेश (६१-६७) : गुरुपरंपरा (६८-७७).

## द्वादशोऽध्यायः। प्रेतसंजीवनम्। : २७३-२९४ :

श्रीगुरूंचे स्वरूप (१-४) : अपत्यनाशाची कारणे. (५-१३) : ब्राह्मणीची भूतबाधा दूर करून तिला पुत्रलाभ. (१४-३२) : ब्राह्मणीच्या ज्येष्ठ पुत्राचा मृत्यू आणि तिचा शोक.(३३-३९) : ग्रामवासीयांचे न ऐकतां तिचे पुत्राला कवटाळून राहणे.(४०-४५) : तापसाचा उपदेश.(४६-५४): ब्राह्मणीला स्वप्नांत दर्शन व प्राणाचे निरूपण.(५५-६०) : पुत्राचे संजीवन.(६१-६६)

## त्रयोदशोऽध्यायः। भीमामरजासङ्गमनिवासः। : २९५-३०८ :

वांझ म्हैस दुभती केली. (१-१०) : राजाच्या प्रार्थनेला मान देऊन गाणगापुरांत आगमन.(११-१८) : गांवाच्या वेशीजवळ ब्रह्मराक्षसाचा उद्धार.(१९-२२). राजाने अर्पण केलेल्या मठांत निवास.(२३-२५). : त्रिविक्रम भारतीला विश्वरूपदर्शन (२६-४९).

## कर्मयोगः। चतुर्दशोऽध्यायः। वेदोपदेशः। : ३०९-३२९ :

कर्म हे ज्ञानाचे साधन कसे आहे. (१-२) : संस्कारांचे महत्त्व आणि विविदिषा. (३-५) : विद्येचा गर्व झालेल्या ब्राह्मणांचे त्रिविक्रम भारतीला आह्वान.(६-२०) : त्रिविक्रमकृत श्रीगुरुस्तुति. (२१-२३). श्रीगुरूंचा गर्विष्ठ ब्राह्मणांना उपदेश आणि वेदनिरूपण.(२४-४५) : चंडालाद्वारें विद्वानांचे गर्वहरण.(४६-५६) : विद्वानांचा पश्चात्ताप व त्यांना उःशाप. (५७-६२).

## पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाकः। : ३३०-३५१ :

चंडालयोनी कुणाला प्राप्त होते? (१-११) : मृत्यूनंतर जीवाची गति. (११-१५) : कोणत्या पापाने कोणत्या योनी प्राप्त होतात. (१६-१९) : पापांपासून रोगांचा उद्भव.(२०-२१) : चोरीची फळे.(२१-२३) : व्यभिचाराची फळे.(२३-२५) : प्रायश्चित्त प्रकरण. (२६-४१) : पतिताचे ज्ञानहरण. (४२-५१) : भस्ममाहात्म्य. (५२-८१).

## षोडशोऽध्यायः। मृतसंजीवनम्। : ३५२-३८३ :

श्रेयस् आणि प्रेयस् मार्ग.(उपोदघात) : सद्गुरूंच्या अगम्य लीला.(१-३) : गोपीनाथाचा पुत्र दत्त याची कथा.(४-१८) : गाणगापुरांत प्रवेश करतांना त्याचा मृत्यू आणि सावित्रीचा शोक.(१९-३०) : साधूच्या रूपांतील श्रीगुरूंचा सावित्रीला उपदेश.(३१-३९) : स्त्रियांचे धर्म. (४०-५७) : विधवाधर्मनिरूपण. (५८-६५) : सहगमनाचे माहात्म्य. (६६-७०) : सावित्रीचा सहगमनाचा निर्धार. (७१-८१) : सहगमनापूर्वी श्रीगुरूंच्या दर्शनाला गेलेल्या साध्वीने केलेली स्तुति. (८२-८४): सावित्रीच्या पतीचे संजीवन. (८५-९९).

## सप्तदशोऽध्यायः। दम्पतीगुरुसंवादः। : ३८४-४०९ :

रुद्राक्षधारणाचा महिमा.(१-७) : वेश्यासतीचे उपाख्यान. (८-२२) : रुद्राध्यायाचे माहात्म्य. (२३-४१) : स्त्रियांना मंत्राचा उपदेश करूं नये याविषयी कचाख्यानाचे निरूपण.(४२-६७) : सोमवारव्रत आणि सीमंतिनीचे उपाख्यान.(६८-१०६).

## अष्टादशोऽध्यायः। कर्मकाण्डकथनम्। : ४१०-४६२ :

परान्नत्यागी ब्राह्मणाच्या कर्कशा पत्नीचा स्वभावपालट.(१-१०) : परान्नाविषयी ग्राह्याग्राह्य विचार. (११-२०) : पराशरप्रणीत कर्ममार्गनिरूपण. (२१-२५) : आचारधर्माची परिभाषा. (२६-५०) : शौच आणि स्नान. (५१-६७) : भस्म, मृत्तिका, चंदन, मुद्रिका यांचे धारण (६८-७२) : आचमन.(७३-८१) : संध्यावंदन. (८२-१०२) : गायत्रीमंत्राचा जप. (१०३-१०८) : गुरूंचे अभिवादन. (१०९-११२) : अग्नीची उपासना. (११३-११८) : गृहशुद्धि. (११८-१२१) : देवपूजा. (१२२-१४५) : ब्रह्मयज्ञ. (१४६-१४८) : तर्पण. (१४९-१५१) : वैश्वदेव आणि बली. (१५२-१५५) : भोजनविधि. (१५६-१७४) : निद्रा.(१७५-१७९) : संभोग. (१८०-१८५) : विचाराचार. (१८६-१८८).

## भक्तियोगः। एकोनविंशोऽध्यायः। भक्तिमहिमावर्णनम्। : ४६३-५०१ :

सर्वसाधनसाधक भक्ति. (१-६) : भास्करब्राह्मणाची कथा.(७-३०) : अश्वत्थमहिमा. (३१-४८) : साठ वर्षांच्या वंध्येला पुत्रप्राप्ती. (४९-७३) : कुष्ठी नरहरी ब्राह्मणाची कथा.(७४-८४) : शबराची शिवभक्ति.(८५-९८) : शुष्क काष्ठाला पालवी आणि नरहरीचा कुष्ठपरिहार. (९९-१०१) : नरहरीकृत श्रीगुरुस्तोत्र. (१०२-११०) : समारोप.(१११-११६).

## विंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५०२-५३० :

सायंदेवाची परीक्षा.(१-२३) : गुरुसेवेची दुष्करता.(२४-२८) : त्वष्टापुत्राची कथा आणि काशीयात्रानिरूपण. (२९-५६) : सायंदेवकृत नृसिंहसरस्वतीस्तोत्र.(५७-६६) : अनंतव्रताचे निरूपण.(६७-१११).

## एकविंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५३१-५५५ :

तंतुकभक्ताला श्रीशैल्यदर्शन आणि श्रीशैल्यमाहात्म्य.(१-३६) : देवीच्या निरोपाने आलेल्या नन्दी ब्राह्मणाचा कुष्ठपरिहार.(३७-५६) : अवशिष्ट कुष्ठ जाण्यासाठी श्रीगुरूंच्या आज्ञेने त्याने केलेली स्तुति. (५७-९१) : नरहरी कवीला कल्लेश्वराठायीं दर्शन आणि अनुग्रह.(९२-१०३).

## द्वाविंशोऽध्यायः। क्षेत्रमाहात्म्यवर्णनम्। : ५५६-५८४ :

भगवंताचे भक्तवात्सल्य आणि भक्तपराधीनता.(१-१२) : आठ रूपांनी आठ भक्तांच्या गांवी दिवाळी साजरी.(१३-३३) : शेतकरी भक्ताचे शेत अमाप पिकविले.(३४-७२) : गाणगापूरच्या अष्टतीर्थांचे निरूपण. (७३-१०२).

## त्रयोविंशोऽध्यायः। : ५८५-६१९ :

पाप-तापहारी श्रीगुरुचरित्र मोक्षाहूनही ग्राह्य.(१-९) : कुरुगड्डीच्या परीटाला राज्याचे वरदान.(१०-१८) : त्याचा बिदरचा राजा म्हणून पुनर्जन्म.(१९-२६) : स्फोटकग्रस्त राजाला ब्राह्मणाचा उपदेश व ऋषभमुनींची कथा.(२७-६५) : म्लेच्छ राजाच्या स्फोटकाचे शमन.(६६-७७) : म्लेच्छ राजाच्या गांवी गमन व त्याचा उद्धार.(७८-१०५) : श्रीशैलयात्रा व गाणगापुरच्या मठांत शाश्वत वास.(१०६-११२) : ग्रंथाचा उपसंहार आणि मंगलाचरण.(११२-११८).

## योगरहस्यम्। : ६२०-६४० :

## बोधरहस्यम्। : ६४१-६६३ :

## सप्ताहपाठपद्धति -

प्रथमेऽह्नि, चतुर्थाध्यायांत, द्वितीये नवमाध्यायांत, तृतीये चतुर्दशाध्यायान्त, पंचमे एकोनविंशाध्यायन्त, षष्ठे एकविंशाध्यान्त, सप्तमे त्रयोविंशाऽध्यायान्त पठित्वा रहस्यद्वयं पठेत्। प्रत्यहमादौ ग्रन्थपूजनोत्तरं श्रीवैष्णवेत्यादिस्तुतयः पठेत्। अन्ते चोत्तरपूजनं कृत्वा 'रसज्ञा वशे'त्यपराधक्षमापनस्तोत्रं पठेत्।

पहिल्या दिवशीं यथाविधि संकल्प करून तसेच ग्रंथपूजन करून वाचनाला आरंभ करावा. प्रतिदिनी आरंभी श्रीगुरुस्तुति वाचावी व मग त्या दिवशींचे अध्याय वाचावेत. **१ल्या दिवशी ४थ्या अध्यायापर्यंत, २न्या दिवशी ९ अध्यायापर्यंत, ३न्या दिवशी १४व्या अध्यायापर्यंत, ४थ्या दिवशी १७ व्या अध्यायापर्यंत, ५ व्या दिवशी १९ व्या अध्यायापर्यंत, ६ व्या दिवशी २१ व्या अध्यायापर्यंत आणि ७ व्या दिवशी २३ व्या अध्यायापर्यंत वाचून योगरहस्य आणि बोधरहस्य वाचून उत्तरपूजा करावी.** वाचनानंतर रोज 'रसज्ञा वशा तारकं स्वादु लभ्यं..' हे क्षमापराधनस्तोत्र वाचावे. पारायणकालांत श्रीगुरुचरित्राच्या पारायणाचे सर्व शुचिता-आहार-विहारादि नियम पाळावेत.

**या ग्रंथाचे मराठी भाषांतर स्त्रियांना वाचण्यास हरकत नाही.**

या ग्रंथाचे एकाह्न पारायणसुद्धां करतां येते. संकल्प व ग्रंथपूजन करून श्रीगुरुस्तुतीपासून आरंभ करून बोधरहस्यापर्यंत वाचन पुरे झाल्यावर रसज्ञा वशा स्तोत्राचा पाठ करून उत्तरपूजा करावी.

# श्रीगुरुस्तुतिः

मंगलाचरण

**श्रीवैष्णवैशगाणेश-सौर्यशाक्त्यादिरूपधृक् । दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनन्तः सदा मे हृदि सद्गुरुः ॥१॥**
**योऽजोऽनन्तोऽगुणोऽरूपो निस्तृडेकोऽक्रियोऽसृजत् । विश्वं धृत्वा षोडशांशं पुंरूपं योगमायया ॥२॥**
**दृश्यते ज्ञानदृष्ट्या यत्सहस्राक्षिशिरोऽङ्घ्रि सत् । रूपं यदङ्गसंस्थानैर्लोकव्यासः प्रकल्प्यते ॥३॥**

श्री+वैष्णव+ऐश+गाणेश+सौर्य+शाक्त्य+आदि+रूप+धृक् अजः अनन्तः दत्तात्रेयः सदा मे हृदि अस्तु।१। यः अजः अनन्तः अगुणः, अरूपः, निस्तृट्, एकः अक्रियः योग+मायया षोडश+अंशं पुं+रूपं धृत्वा विश्वं असृजत्।२। यत् (पुंरूपं) सहस्र+अङ्घ्रि+शिरः सत् रूपं ज्ञानदृष्ट्या दृश्यते। यत्+अङ्ग+संस्थानैः लोक+व्यासः प्रकल्प्यते।३।

पहिला श्लोक हे देवतावाचक मंगल आहे. *देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः। सर्वे ते नैव निंद्याः स्युर्लिपितो गणितोपि वा। मंगलाचरणं शिष्टाचारात्फलदर्शनाच्छ्रुतितश्च।* (सांख्यदर्शन ५।१). ज्ञान, ऐश्वर्य आदि वैभवाने युक्त अशा विष्णु, शिव, गणेश, सूर्य, देवी (शक्ति) तसेच इंद्र, अग्नि (आदि) मूर्ति आपल्या मायेच्या सामर्थ्याने धारण करणारे पण तत्त्वतः अनादि आणि अनंत असणारे सद्गुरू दत्तभगवान् नित्य माझ्या चित्तांत असोत.१.

**दत्तात्रेयांचे स्वरूप.** असा जो जन्मरहित, अनंत, निर्गुण, निरिच्छ, एकमेवाद्वितीय, अक्रिय परमात्मा त्याने आपल्या योगमायेने सोळा अंशांचे (११ इंद्रिये आणि पंचमहाभूते) विराट पुरुषरूप धारण करून विश्व निर्माण केले. अनंत पाय आणि अनंत शिरे असलेले ते स्वरूप (योगीजनांनाच) ज्ञानचक्षूंनी दिसते. या विराट रूपाच्या अवयवांपासूनच पातालादि लोकांचा विस्तार झाला आहे.२-३.

**नानावतारबीजं यदनन्तं यत्कलामुखैः । देवतिर्यङ्मुखं सृष्टमस्वतन्त्रं जगत्पुरु ।।४।।**
**गोभिः स्वार्थादानमीश-सृष्टं नेशात्परं क्वचित् । देहेन्द्रियात्मजीवोत्थौ रागद्वेषावियन्तु भित् ।।५।।**
**भूतेट् सोऽजोऽव्ययात्मापि संभवत्यात्ममायया । श्रेयोऽर्हसाधुगुप्त्यै स्वप्रकृतिस्थो युगे युगे ।।६।।**

यत् अनन्तं नाना+अवतार+बीजम्। यत्+कला+मुखैः देव+तिर्यक्+मुखं अस्वतन्त्रं पुरु जगत् सृष्टम्।४। गोभिः स्व+अर्थ+आदानं ईश+सृष्टम्। ईशात् परं न क्वचित्। देह+इन्द्रिय+आत्म+जीव+उत्थौ राग+द्वेषौ इयं तु भित्।५। सः भूत+ईट् अजः अव्ययः अपि आत्म+मायया स्व+प्रकृति+स्थः श्रेयः+अर्ह+साधु+गुप्त्यै युगे युगे संभवति।६।

ह्याच अनेक अवतारांच्या बीज असलेल्या अनंत स्वरूपाने आपल्या ब्रह्मदेव, मरीचि आदि कलांच्या द्वारा देव-तिर्यगादि योनींनी युक्त अशा अपरिमित अशा जगताची निर्मिति केली.४. (ह्या जगांत) इंद्रियांची आपापले विषय ग्रहण करण्याची क्षमता परमेश्वरानेच निर्मिली आहे. सर्वांचे अधिष्ठान अशा ईश्वराखेरीज (ह्या सृष्टीत) कांहीच नाही. तरी पण देह आणि इंद्रिये यांच्याशी तादात्म्य होऊन त्यांच्या अभिमानाने जीवाला राग (आकर्षण) आणि द्वेष प्राप्त झाले. हेच भेदाचे मूळ होय. म्हणजेच जीवसृष्टी आणि ईश्वरसृष्टी असा भेद भासू लागला. ह्या भेदामुळेच जीव आपल्या सच्चिदानंदैकरस स्वरूपाला विसरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी अशी विपरीत भावना करतो.५. तोच सर्व भूतांचा ईश्वर, अजन्मा आणि अक्षर असूनही, आपल्या आपल्या प्रकृतीचा, म्हणजेच मायेचा आश्रय करून, मोक्षाला योग्य अशा साधूंच्या रक्षणासाठी जन्म घेतो. *(अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया।।.. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।। श्री.भ.गी.४।६, ८.)*६.

**श्रुत्वा तत्कर्म निर्द्वन्द्वो मुच्यते कर्मबन्धनात् । न तथा कर्मसिद्धीप्सुर्द्वन्द्वात्मा भ्रान्तहृन्नरः ।।७।।**
**गुणकर्मभिदा सृष्ट-चातुर्वर्ण्यस्य सोऽव्ययः । कर्ताप्यकर्ता यैर्ज्ञातो बध्यन्ते कर्मभिर्न ये ।।८।।**
**भूभारभूततद्वेष्य-घाताय विविधास्तनूः । धृत्वा कण्टकवन्मत्वा कृतकार्यो जहात्यसौ ।।९।।**
**अस्यैवापूर्णकृत्याः स्युस्तन्वस्तासूत्तमोत्तमा । तनुरेकास्ति दत्ताख्या कृपासूः स्मर्तृगामिनी ।।१०।।**

तत्+कर्म श्रुत्वा निर्द्वन्द्वः (यथा) कर्म+बन्धनात् मुच्यते तथा कर्म+सिद्धि+ईप्सुः द्वन्द्व+आत्मा भ्रान्त+हृत् नरः न (मुच्यते)।७। गुण+कर्म+भिदा सृष्ट+चातुर्वर्णस्य सः अव्ययः कर्ता अपि यैः अकर्ता ज्ञाता, ये कर्मभिः न बध्यन्ते, भू+भार+भूत तत्+द्वेष्य+घाताय असौ विविधाः तनूः धृत्वा कृत+कार्यो कण्टकवत् मत्वा जहाति।८-९। अस्य एव अपूर्ण+कृत्याः तन्वः स्युः। तासु एका उत्तम+उत्तमा कृपासूः स्मर्तृ+गामिनी तनुः अस्ति।१०।

त्या (त्या अवतारांच्या साधुरक्षणात्मक) चरित्राचे निष्कामतया श्रवण केल्याने साधु जसा कर्मबंधनांतून सुटतो तसा कर्मफलाची अभिलाषा करणारा भ्रांतचित्त श्रवणपराङ्मुख असाधु मुक्त होत नाही.७. सत्त्व, रज आणि तम हे गुण आणि शमादि कर्म यांच्या भेदानुसार चार वर्णांची निर्मिती करणारा तो परमात्मा असंग आणि उदासीन असल्याने अकर्ताच आहे असे जाणल्याने स्वकर्मांनी जे बांधले जात नाहीत,८. त्या (साधूंचा) द्वेष करणारे, भूमीला भारभूत झालेले जे दुष्ट, त्यांचा विनाशासाठी विविध शरीरे धारण करून हा प्रभू (त्या त्या अवतारांचे) कार्य पूर्ण होतांच त्यांना (कांटा काढण्यासाठी घेतलेल्या) कांट्याप्रमाणे टाकून देतो. त्या त्या देहांचे विसर्जन करतो.९.

**अवताररहस्य.** (असे जर आहे तर नर, नारायण, नारद, सनक इत्यादि कसे चिरंजीव आहेत अशी शंका अपेक्षून महाराज सांगतात) ज्यांचे कार्य अजून अपूर्ण आहे असे ह्या ईश्वराच्या अनेक मूर्ति आहेत. त्यांतीलच एक उत्तमोत्तम श्रीदत्त या नांवाची तनू कृपाळू आणि स्मर्तृगामी अशी आहे.१०.

**मुक्तैर्मुमुक्षिभिश्चान्यैर्ध्येया नान्येदृशी कलौ । कामदा यस्य कस्यापि स्मृतिगामिन्यनुक्षणम् ।।११।।**
**विश्वं ततान योऽव्यक्तस्तद्यत्स्थं यो न तत्स्थितः । तद्यत्स्थं नैश्वराद्योगात्तद्भृत्तत्स्थो न वायुवत् ।।१२।।**
**मावशाद्योऽवशोऽभीक्ष्णं व्यसृजत्तदबंधनः । येनाध्यक्षेण मा सूते जगद्वेदामलं न यम् ।।१३।।**
**नृरूपेणावतीर्णं यत्तत्त्वाज्ञोऽसुरभावगः । न वेत्ति योगगम्यं यं सद्धर्मत्राणकारणम् ।।१४।।**

कलौ मुक्तैः मुमुक्षुभिः च अन्यैः ध्येया ईदृशी कामदा, अनुक्षणं स्मृतिगामिनी अन्या न।११। यः अव्यक्तः विश्वं ततान, तत् यत्स्थं, यः न तत्+स्थितः। तत् न यत्+स्थं ऐश्वरात् योगात् वायुवत् तत्+भृत् न तत्+स्थः।१२। मा+वशात् यः अवशः अभीक्ष्णं तत् अबन्धनः व्यसृजत्। मा येन अध्यक्षेण जगत् सूते यं अमलं न वेद।१३। यत्+तत्त्व+अज्ञः असुर+भाव+गः नृ+रूपेण+अवतीर्णं योगगम्यं सत्+धर्म+त्राण+कारणं न वेत्ति।१४।

मुक्त, मुमुक्षु आणि विषयी यांनी चिंतण्यायोग्य, स्मरणमात्रे संतोष पावून क्षणमात्रांत प्रत्येकाच्या कामना पुरविणारे कलियुगांत दुसरे दैवत नाही.११. विश्वाचा विस्तार करणारा तो ज्ञान, ऐश्वर्य, बल, तेज आणि वीर्यानी युक्त असा अव्यक्त (परोक्ष) पुरुष ज्याच्या ठायीं ते (विश्व) स्थित आहे, त्यांचे पोषण करतो आहे. तरीसुद्धां जो जगाला धारण करणारा ईश्वर वायूप्रमाणे सर्वव्याप्त असूनही त्या विश्वांत स्थिरावत नाही. श्रीमच्छंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे मायेच्या अध्यासाने हे अखिल जगत् मी विस्तारलेले असल्याने ते सर्व जीव माझ्याच आधाराने स्थिर आहेत; पण मी त्यांच्यात नाही. शिंपल्यावर चांदीचा भास होतो. त्या शिंपल्यांतच चांदी आहे; पण चांदीत मात्र शिंपल्याचा अंशही नसतो. म्हणूनच भगवंत म्हणतात हे सर्व जीव माझ्यांत राहतात. हे सर्व इंद्रियगोचर जगत् इंद्रजालाप्रमाणे मिथ्या आहे.१२. मायेच्या योगाने पण मायेला वश न होता तिच्या बंधनाच्या पलीकडे असणारा (परमात्मा) ह्या वैविध्यपूर्ण जगाचे सृजन करतो. ज्याच्या आधिपत्याखाली माया ह्या जगताला जन्म देते; ते जगत् मात्र त्या शुद्ध ईश्वराला जाणत नाही.१३. त्या संत आणि धर्म यांच्या रक्षणासाठी मनुष्यरूपाने अवतरलेल्या योगगम्य भगवंताला, त्याचे तत्त्व न जाणणारे, आसुरी संपत्तीने अभिभूत झालेले (दुष्ट जीव) ओळखत नाहीत.१४.

**सोऽन्वर्थाख्यानसूयात्रिपुत्रो जज्ञेऽज ईश्वरः । अचिन्त्याव्यक्तरूपोऽपि दत्तोऽर्च्यः स्मृतितोषणः ॥१५॥**
**परानन्दमयो विष्णुर्हृत्स्थोऽवेद्योऽप्यतीन्द्रियः । सदा सम्पूज्यते भक्तैर्भगवान् भक्तिभावनः ॥१६॥**
**अचिन्त्यस्य कुतो ध्यानं कूटस्थावाहनं कुतः। क्वासनं विश्वसंस्थस्य पाद्यं पूतात्मनः कुतः ॥१७॥**
**क्वानर्घोरुक्रमस्यार्घ्यं विष्णोराचमनं कुतः। निर्मलस्य कुतः स्नानं क्व निरावरणेऽम्बरम् ॥१८॥**

सः अनु+अर्थ+आख्यः अनसूया+अत्रि+पुत्रः ईश्वरः जज्ञे। अचिन्त्य+अव्यक्त+रूपः अपि स्मृति+तोषणः दत्तः अर्च्यः।१५। पर+आनन्द+मयः विष्णुः हृत्स्थः अवेद्यः अति+इन्द्रियः अपि भक्तिभावनः भगवान् भक्तैः सदा सम्पूज्यते।१६। अचिन्त्यस्य कुतः ध्यानम्? कूटस्थ+आवाहनं कुतः? विश्व+संस्थस्य क्व आसनम्? पूत+आत्मनः पाद्यं कुतः?।१७। अनर्घ+उरु+क्रमस्य अर्घ्यं क्व? विष्णोः आचमनं कुतः? निर्मलस्य कुतः स्नानं? निरावरणे अम्बरं क्व?।१८।

**दत्तात्रेयांच्या सगुण स्वरूपाची पूजनीयता.** स्वतःचेच दान करून आपले दत्त हे नाम सार्थक केलेला अनसूया आणि अत्रीचा पुत्रच ईश्वर आहे असे जाणा. अचिंत्य आणि अव्यक्त (मन आणि इंद्रियांच्या अतीत) रूपाच्या त्या स्मरणानेच संतुष्ट होणाऱ्या दत्ताचे पूजन करावे.१५. परमानंदस्वरूप तो विष्णु हृदयस्थ असूनही अतीन्द्रिय असल्याने जाणीवेच्या पलीकडे आहे. तरीही भक्तीने वश होणाऱ्या त्या भगवंताचे भक्तांनी श्रद्धेने नित्य पूजन केले पाहिजे.१६. **मानसपूजा.** ह्या मानसपूजेचा पूर्वार्ध श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या परापूजा ह्या स्तोत्राशी खूप जुळणारा आहे. अचिंत्याचे ध्यान कसे करतां येईल? अखंडतया एकरूपाने तिन्ही कालांना व्यापणाऱ्याचे आवाहन कसे करतां येईल?१७. ज्याचे पदकमल अनर्घ म्हणजे अमूल्य आहेत त्याला अर्घ्य कशाचे देणार? सर्वव्यापकाला आचमन काय द्यावे? शुद्धस्वरूपाला कुठले स्नान? आवरणातीताला वस्त्र कुठून आणावे?१८.

**स्वसूत्रस्य कुतः सूत्रं निर्मलस्य च लेपनम् । निस्तृषः सुमनोभिः किं किमक्लेद्यस्य धूपतः ।।१९।।**
**स्वप्रकाशस्य दीपैः किं किं भक्ष्याद्यैर्जगद्भृतः । किं देयं परितृप्तस्य विराजः क्व प्रदक्षिणाः ।।२०।।**
**किमनन्तस्य नतिभिः स्तौति को वागगोचरम् । अन्तर्बहिःप्रपूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ।।२१।।**
**सर्वतोऽपीत्यसंभाव्यो भाव्यते भक्तिभावनः । सेव्यसेवकभावेन भक्तैर्लीलानृविग्रहः ।।२२।।**
**तवेशातीन्द्रियस्यापि पारम्पर्याश्रुतां तनुम् । प्रकल्प्याश्मादावर्चन्ति प्रार्चयेऽर्चां मनोमयीम् ।।२३।।**

स्व+सूत्रस्य कुतः सूत्रम्? निर्मलस्य च लेपनम्? निस्तृषः सुमनोभिः किम्? अक्लेद्यस्य धूपतः किम्?।१९। स्व+प्रकाशस्य दीपैः किम्? जगत्+भृतः भक्ष्याद्यैः किम्? परितृप्तस्य किं देयम्? विराजः क्व प्रदक्षिणाः?।२०। अनन्तस्य नतिभिः किम्? वाक्+अगोचरं कः स्तौति? अन्तः+बहिः+परिपूर्णस्य उद्वासनं कथं भवेत्?।२१। इति सर्वतः अपि असंभाव्यः भक्तिभावनः लीला+नृ+विग्रहः भक्तैः सेव्य+सेवक+भावेन भाव्यते।२२। (हे) ईश, तव अति+इन्द्रियस्य अपि पारम्पर्या आश्रुतां तनूं अश्मादौ प्रकल्प्य अर्चन्ति। मनोमयीं अर्चां प्रार्चये।२३।

स्वसूत्राला (सर्वतंत्रस्वतंत्र अशा देवाला) सूत्र (यज्ञोपवीत) कुठले? निर्मलाला गंध लेपन कोणते द्यावे? तृष्णारहित परमात्म्याला फुलाचे काय महत्त्व? अक्लेद्य (पाण्याने न ओलावणाऱ्या) देवाला धूपाचा काय उपयोग? स्वयंप्रकाशाला दिवा कशासाठी दाखवावा? जगाचे पोषण करणाऱ्याला खाद्याची काय आवश्यकता? नित्यतृप्त भगवंताला काय दक्षिणा द्यायची? विराट पुरुषाला प्रदक्षिणा कशी करायची? अनन्ताला नमस्कारांनी काय होणार? आणि वाचेला अगोचर अशा देवाची स्तुति तरी कशी करणार? अंतर्बाह्य परिपूर्ण अशा ईश्वराचे विसर्जन कसे होईल?१९-२१. अशा सर्वतोपरी अकल्पनीय अशा भगवंताने लीलेने धारण केलेल्या नरदेहाची कल्पना करून, त्याला स्वामी मानून सेवकभावाने पुजावे; कारण तो भक्तीला पावतो.२२. (हे भगवंता) तूं अतींद्रिय असलास तरी गुरुपरंपरेने चालत आलेल्या पाषाणादि अष्टविध प्रतिमांनाच तुझे शरीर मानून अल्पबुद्धीचे भक्त पूजन करतात. मी ध्यानयोगासाठी, मनाची लवकर एकाग्रता होण्यासाठी ह्या आठ मूर्तींत उत्तम मानल्या गेलेल्या मानस मूर्तीचे तीव्रतेने पूजन करीत आहे.२३.

**कलसुश्लोकगीतेन भगवन्दत्त जागृहि । भक्तवत्सल सामीप्यं कुरु मे मानसार्चने ।।२४।।**
**श्रीदत्तं खेचरीमुद्रा-मुद्रितं योगिसद्‌गुरुम् । सिद्धासनस्थं ध्यायेऽभी-वरप्रदकरं हरिम् ।।२५।।**
**दत्तात्रेयाह्वयाम्यत्र परिवारैः सहार्चने । श्रद्धाभक्त्येश्वरागच्छ ध्यातधाम्नाञ्जसा विभो ।।२६।।**
**सौवर्णं रत्नजडितं कल्पितं देवतामयम् । रम्यं सिंहासनं दत्त तत्रोपविश यंत्रिते ।।२७।।**
**पाद्यं चंदनकर्पूर-सुरभि स्वादु वारि ते । गृहाण कल्पितं तेन दत्ताङ्घ्री क्षालयामि ते ।।२८।।**

(हे) भगवन् दत्त! कल+सुश्लोक+गीतेन जागृहि। (हे) भक्तवत्सल, मानस+अर्चने मे सामीप्यं कुरु।२४। सिद्ध+आसनस्थं खेचरी+मुद्रा+मुद्रितं अभी+वर+प्रदं योगि+सद्गुरुं हरिं ध्याये।२५। अत्र दत्तात्रेयाय परिवारैः सह अर्चने श्रद्धा+भक्त्या आह्वयामि। (हे) विभो ध्यात+धाम्ना अञ्जसा आगच्छ।२६। (हे) दत्त, सौवर्णं रत्नजडितं रम्यं देवतामयं सिंहासनं कल्पितम्। तत्र यंत्रिते (सिंहासने) उपविश।२७। चंदन+कर्पूर+सुरभि+स्वादु वारि ते पाद्यं कल्पितं, तेन (हे) दत्त, ते अङ्घ्री क्षालयामि।२८।

**मानसमूर्तीची षोडशोपचार पूजा** - **(प्रबोध)** आपल्या चित्ताकर्षक आणि सुंदर कीर्तीचे गुणगान असलेल्या गीतांनी, हे दत्तप्रभू, आपण जागे व्हा आणि हे भक्तवत्सला ह्या मानसपूजेत माझ्यासमीप रहा.२४. **(ध्यान)** सिद्धासनावर बसून खेचरी मुद्रा धारण केलेल्या तसेच हातांनी वर आणि अभय दर्शविणाऱ्या योग्यांच्या सद्गुरु श्रीदत्तांचे मी ध्यान करतो. इथे द्विभुज मूर्तीचे ध्यान अभिप्रेत दिसते. स्तुतीच्या अंतींचे सविस्तर ध्यानही दिगंबर आणि द्विभुज असेच आहे.२५. **(आवाहन)** श्रीदत्तात्रेयांना परिवारासह ह्या पूजेसाठी मी श्रद्धेने आणि भक्तीने आवाहन करतो. हे सर्वव्यापी देवा, आपण शीघ्र या ध्यानमूर्तींत या.२६. **(आसन)** हे दत्ता, मी आपल्यासाठी हे सुवर्णाचे, देवतामय, यंत्रयुक्त रम्य सिंहासन कल्पिलेले आहे. त्यावर विराजमान व्हा.२७. **(पाद्य)** चंदन, कापूर आणि केशर यांनी युक्त असे हे मधुर जल आपल्यासाठी पाद्य म्हणून कल्पिले आहे. त्याने आपले पाय मी धूत आहे.२८.

**गन्धाब्जतुलसीबिल्व-शमीपत्राक्षतान्वितम् । साम्ब्वर्घ्यं स्वर्णपात्रेण कल्पितं दत्त गृह्यताम् ।।२९।।**

**सुस्वाद्वाचमनीयाम्बु हैमपात्रेण कल्पितम् । तुभ्यमाचम्यतां दत्त मधुपर्कं गृहाण च ।।३०।।**

**पुष्पवासितसत्तैलमंगेष्वालिप्य दत्त भोः । पंचामृतैश्च गांगाद्भिः स्नानं ते कल्पयाम्यहम् ।।३१।।**

**भक्त्या दिगंबराचान्तजलेदं दत्त कल्पितम् । काषायपरिधानं तद् गृहाणैणेयचर्म च ।।३२।।**

**नानासूत्रधरैते ते ब्रह्मसूत्रे प्रकल्पिते । गृहाण दैवतमये श्रीदत्त नवतन्तुके ।।३३।।**

गन्ध+अब्ज+तुलसी+बिल्व+शमी+पत्र+अक्षता+अन्वितं सु+अम्बु स्वर्ण+पात्रेण कल्पितं (हे) दत्त, गृह्यताम्।२९। (हे) दत्त! तुभ्यं सुस्वादु आचमनीयं अम्बु हैम+पात्रेण कल्पितम्, आचम्यताम्। मधुपर्कं च गृहाण।३०। भोः दत्त! पुष्प+वासित सत्+तैलं अङ्गेषु आलिप्य। पंचामृतैः च गाङ्ग+अद्भिः अहं ते स्नानं कल्पयामि।३१। (हे) दत्त, भक्त्या कल्पितं इदं जलं आचान्त, काषाय+परिधानं तत् ऐणेय+चर्म च गृहाण।३२। (हे) नाना+सूत्र+धर श्रीदत्त, एते ते दैवतमये नवतन्तुके प्रकल्पिते ब्रह्मसूत्रे गृहाण।३३।

**(अर्घ्य)** गंध, अक्षता, बेल-तुलसी-शमी यांच्या पानांनी तसेच कमलाने युक्त पाण्याचे अर्घ्य मी सुवर्णपात्रांत कल्पिले आहे. ते आपण ग्रहण करा.२९. **(आचमन)** सोन्याच्याच कलशांत कल्पिलेले हे मधुर जल आपल्या आचमनासाठी आणले आहे. त्यांनी आचमन करून हा मधुपर्क घ्या.३०. **(स्नान)** हे दत्ता, विविध फुलांनी सुगंधित असे हे तेल आपल्या अंगाला लावून घ्या. पंचामृताने आणि गंगोदकाने आपल्याला मनाने न्हाऊं घालत आहे.३१. **(वस्त्र)** स्नानोत्तर मी भक्तीने कल्पिलेल्या ह्या पाण्याने आचमन करून हे भगवे वस्त्र धारण करा आणि हे मृगचर्म घ्या.३२. **(यज्ञोपवीत)** नानासूत्रधारी श्रीदत्ता, दैवतमय असे नऊ तंतूंचे मी कल्पनेने केलेले यज्ञोपवीत धारण करा.३३.

**भूतिमृत्स्नासुकस्तूरी-केशरान्वितचंदनम् । रत्नाक्षताः कल्पितास्त्वामलङ्कुर्वेऽथ दत्त तैः ।।३४।।**
**सच्छमीबिल्वतुलसी-पत्रैः सौगंधिकैः सुमैः । मनसा कल्पितैर्नानाविधैर्दत्तार्चयाम्यहम् ।।३५।।**
**लाक्षासिताभ्रश्रीवास-श्रीखण्डागरुगुग्गुलैः । युक्तोऽग्निर्योजितो धूपो हृदा स्वीकुरु दत्त तम् ।।३६।।**
**स्वर्णपात्रे गोघृताक्त-वर्तिप्रज्वालितं हृदा । दीपं दत्त सकर्पूरं गृहाण स्वप्रकाशक ।।३७।।**
**सषड्रसं षड्विधान्नं नैवेद्यं गव्यसंयुतम् । कल्पितं हैमपात्रे ते भुंक्ष्व दत्तांब्वदः पिब ।।३८।।**

(हे) दत्त, भूति+मृत्स्ना+सुकस्तूरी+केशर+अन्वित+चन्दनं रत्न+अक्षताः (च) त्वां कल्पिताः। अथ तैः अलङ्कुर्वे।३४। (हे) दत्त, मनसा कल्पितैः सत्+शमी+बिल्व+तुलसी+पत्रैः, नानाविधैः सौगन्धिकैः सुमैः अर्चयामि।३५। (हे) दत्त! हृदा लाक्षा+सिताभ्र+श्रीवास+श्रीखंड+अगरु+गुग्गुलैः धूपः अग्निना योजितः। तं स्वीकुरु।३६। (हे) स्वप्रकाशक दत्त, हृदा स्वर्ण+पात्रे गो+घृत+आक्त+वर्ति+प्रज्वालितं सकर्पूरं दीपं गृहाण।३७। स+षड्+रसं गव्य+संयुतं षट्+विध+अन्नं हैमपात्रे ते नैवेद्यं कल्पितम्। (हे) दत्त, भुङ्क्ष्व, अदः अम्बु पिब।३८।

**(गंधाक्षता)** हे दत्ता, भस्म, मृत्तिका, कस्तूरी, केशर यांचे बनविलेले चंदन आणि ह्या रत्नाच्या अक्षतांनी आपण अलंकृत व्हा.३४. **(पुष्प)** दत्तराज, मनानेच कल्पिलेल्या उत्तम शमी, बिल्व आणि तुलसी यांच्या पानांनी आणि नानाविध सुगंधित पुष्पांनी मी आपली पूजा करीत आहे.३५. **(धूप)** लाख, अभ्रक, श्रीवास (वृकधूप), चंदन, अगरु आणि गुग्गुळ यांच्यापासून हा मनाने केलेला धूप मी जाळीत आहे. त्याचा स्वीकार करा.३६. **(दीप)** हे स्वयंप्रकाश प्रभो, गाईच्या तुपांत भिजवलेल्या वातींनी मनानेच उजळलेला हा दीप आणि कापूर यांचा स्वीकार करा.३७. **(नैवेद्य)** भक्ष्य (घागरे, अनारसे इत्यादि), भोज्य (पायस, खीर वगैरे), लेह्य (गूळ, मध, श्रीखंड इत्यादि), चोष्य (ऊंसाच्या कांड्यासारखे), पेय (पन्हे, सार इ.) आणि चर्व्य (पापड, कुरुड्या, सांडगे इ.) असे सहा प्रकारचे, तसेच मधुर, खारट, तिखट, कडू, आंबट आणि तुरट अशा सहा रसांनी युक्त असलेले हे अन्न मी सोन्याचा ताटांत मनानेच वाढले आहे ते भक्षण करा.३८.

**प्रक्षाल्यास्यं करौ चाद्भिर्दत्ताचम्य प्रगृह्यताम् । तांबूलं दक्षिणां हैमीं कल्पितानि फलानि च ।।३९।।**
**नीराज्य रत्नदीपैस्त्वां प्रणम्य मनसा च ते । परितस्त्वत्कथोद्घातैः कुर्वे दत्त प्रदक्षिणाः ।।४०।।**
**मन्त्रवन्निहितो मूर्ध्नि दत्त ते कुसुमाञ्जलिः । कल्प्यन्ते मनसा गीत-वाद्यनृत्योपचारकाः ।।४१।।**
**प्रेर्यमाणप्रेरकेण त्वया दत्तेरितेन ते । कृतेयं मनसा पूजा श्रीमंस्तुष्टो भवानया ।।४२।।**
**दत्त मानसतल्पे मे सुखनिद्रां रहः कुरु । रम्ये व्यायतभक्त्यामतूलिकाढ्ये सुवीजिते ।।४३।।**

(हे) दत्त, आस्यं करौ च प्रक्षाल्य, आचम्य । कल्पितानि ताम्बूलं, हैमीं दक्षिणां, फलानि च प्रगृह्यताम्।३९। (हे) दत्त, त्वां मनसा रत्न+दीपैः नीराज्य, ते प्रणम्य च, त्वत् परितः त्वत्+कथा+उद्घातैः प्रदक्षिणाः कुर्वे।४०। (हे) दत्त, ते मूर्ध्नि मन्त्रवत् कुसुम+अञ्जलिः निहितः। गीत+वाद्य+नृत्य+उपचारकाः मनसा कल्प्यन्ते।४१। (हे) दत्त, मे रम्ये व्यायत+भक्ति+आम+तूलिका+आढ्ये मानस+तल्पे रहः सुख+निद्रां कुरु।४२। (हे) दत्त, प्रेर्यमाण+प्रेरकेण त्वया ईरितेन इयं पूजा मनसा कृता। (हे) श्रीमन्, अनया तुष्टः भव।४३।

**(फल-तांबूल-दक्षिणा)** भोजनोत्तर हात धुवून हे पुन्हा आचमन घ्या आणि मनाचेच विडा, सोन्याची दक्षिणा आणि फळ स्वीकारा. ३९. **(आरती-प्रदक्षिणा)** हे दत्ता, (मनाच्याच) रत्नदीपांनी तुला नीरांजन करून नमस्कार करतो आणि तुझ्या कथांचे गान करीत तुझ्याभोवती प्रदक्षिणा करतो.४०. **(मंत्रपुष्प-राजोपचार)** मंत्रघोषासहित ही पुष्पांजली आपल्या मस्तकावर वाहून गीत, वाद्य, नृत्य हे उपचारही मनानेच कल्पिले आहेत.४१. **(समर्पण)** आम्हां सर्वांना स्फूर्ती देणाऱ्या श्रीमंत दत्ता, सर्वांतर्यामि अशा तुझ्याच प्रेरणेने ही मानसपूजा केली. तिने तू प्रसन्न हो.४२. **(विसर्जन)** हे दत्तसखया, माझ्या मनोरूपी पलंगावर घातलेल्या विशाल भक्तिरूप कोमल गादीवर आपण सुखाने पहुडा. हा प्राणवायू आपल्याला विंझण करीत आहे.४३.

## क्षमापराधन

**रसज्ञावशा तारकं स्वादु लभ्यं गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४४।।**
**वियोन्यन्तरे दैवदार्ढ्याद्विभो प्राग्, गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४५।।**
**मया मातृगर्भस्थितिप्राप्तकष्टाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४६।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, रसज्ञा वशा, तारकं स्वादु लभ्यं ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४४। (हे) विभो वियोनि+अन्तरे दैव+दार्ढ्यात् प्राक् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४५। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया मातृ+गर्भ+स्थिति+प्राप्त+कष्टात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४६।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, माझी जिह्वा स्वाधीन असूनही, मी आपले सहजसुलभ, तारक आणि गोड नाम कधीच घेतले नाही. ह्या माझ्या कायिक, वाचिक आणि मानसिक अपराधांची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४४.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, पूर्वजन्मीं मानवेतर योनीत असतांना दुर्दैवाने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४५.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी मातेच्या कुशीत गर्भयातना भोगीत असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४६.

**मया जातमात्रेण संमोहितेन गृहीतं  कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४७।।**
**मया क्रीडनासक्तचित्तेन बाल्ये गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४८।।**
**मया यौवनेऽज्ञानतो भोगतोषाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४९।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया जातमात्रेण संमोहितेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४७। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया बाल्ये क्रीडन+आसक्तेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४८। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया यौवने अज्ञानतः भोग+तोषात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४९।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, नवजात अवस्थेत कशाचीच शुद्ध नसल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४७.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, बालपणी खेळांतच निमग्न असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४८.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, तारुण्यावस्थेत अज्ञानवश भोगासुखांतच रमून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४९.

**मया स्थाविरेऽनिघ्नसर्वेन्द्रियेण गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**

**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५०।।**

**हृषीकेश मे वाङ्मनःकायजातं हरेऽज्ञानतो ज्ञानतो विश्वसाक्षिन् ।।**

**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५१।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया स्थाविरे अनिघ्न+सर्व+इन्द्रियेण ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५०। (हे) हृषीकेश, हरे, विश्व+साक्षिन्, क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मे ज्ञानतः अज्ञानतः (कायिक) अपराधं क्षमस्व, (वाचिक) अपराधं क्षमस्व, (मानसिक) अपराधं क्षमस्व।५१।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, म्हातारपणी माझा सर्व इंद्रियांवरचा ताबा सुटून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५०.

हे इंद्रियांच्या स्वामिन्, क्लेश हरण करणाऱ्या विश्वसाक्षी आर्द्रहृदय दत्ता, मी जाणता वा अजाणता काया, वाचा आणि मनाने केलेल्या अपराधांची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५१.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी ना तुझे कधी स्मरण केले, न ध्यान, न आवाहन, न पूजा! ना कधी तुझी स्तुति केली, ना गुणगान!! मी कधी तुला नमस्कारही केला नाही!!! ह्या माझ्या त्रिविध अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५२.

**स्मृतो ध्यात आवाहितोऽस्यर्चितो वा न गीतः स्तुतो वन्दितो वा न जप्तः ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५२।।**
**दयाब्धिर्भवादृङ् न सागाश्च मादृग् भवत्याप्तमन्तोर्भवान्मे शरण्यः ।।**
**यथालम्बनं भूर्हि भूनिस्सृतांघ्रे-रिति प्रार्थितं दत्तशिष्येण सारम् ।।५३।।**

(हे) क्लिन्न+चित्त प्रभो, (त्वं) मया न स्मृतः, न ध्यातः, न अर्चितः, वा न गीतः, न स्तुतः, न वन्दितः वा न जप्तः असि। (अतः तं) अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५२। भवादृक् दया+अब्धिः, मादृक् स+अगाः च न। भवति आप्त+मन्तोः मे भवान् (एव) शरण्यः, यथा भू+निःसृत+अङ्घ्रेः भूः हि आलम्बनं (अस्ति)। इति दत्त+शिष्येण सारं प्रार्थितम्।५३।

आपल्यासारखा दयासागर कोणी नाही आणि माझ्यासारखा पापी कोणी नाही! जमिनीवरून घसरून पडलेल्याला जमिनीचाच आधार असावा तसे आपलाच अपराधी असलेल्या माझा आश्रय आपणच आहांत! दत्तशिष्याने हा अभिप्राय प्रार्थनेने सादर केला.५३.

## अष्टोत्तरशतनाम.

(इथे भगवान दत्तात्रेयांची एकशे आठ अर्थगर्भ नांवे 'द'च्या बाराखडीच्या आद्याक्षरांनी गुंफली आहेत.)

**दत्तं वन्दे दशातीतं दयाब्धिं दहनं दमम् । दक्षं दरघ्नं दस्युघ्नं दर्शं दर्पहरं दवम् ।।५४।।**
**दातारं दारुणं दांतं दास्यादं दानतोषणम् । दानं दावप्रियं दावं दासत्रं दारवर्जितम् ।।५५।।**
**दिक्पं दिवसपं दिक्स्थं दिव्ययोगं दिगम्बरम् । दिव्यं दिष्टं दिनं दिश्यं दिव्याङ्गं दितिजार्चितम् ।।५६।।**

दश+अतीतं, दया+अब्धिं, दहनं, दमं, दक्षं, दरघ्नं, दस्यु+घ्नं दर्शं, दर्प+हरं दवं दत्तं वन्दे।५४। दातारं, दारुणं, दान्तं, दास्यादं, दान+तोषणं, दानं, दाव+प्रियं दावं, दास+त्रं दार+वर्जितं (वन्दे)।५५। दिक्+पं, दिवसपं, दिक्+स्थं, दिव्य+योगं, दिक्+अम्बरं, दिव्यं, दिष्टं, दिनं, दिव्य+अङ्गं, दिति+ज+अर्चितम् वेन्दे।५६।

दशेंद्रियांच्या अतीत, दयेचे सागर, अग्निस्वरूप, दुष्टांचे (कामादि षड्रिपूंचे) दमन करणारा, भक्तरक्षणांत दक्ष, भयहारक, (भक्तांची हत्या करणाऱ्या) चोरांना मारणारा, (पितरांच्या तृप्तीसाठी) दर्शरूप (अमावास्येचे श्राद्ध), गर्वाचा नाश करणारा, *'वन्याय च'* या श्रुतीनुसार वनस्वरूप अशा दत्ताला वंदन असो.५४. स्वतःचेही दान करणारा दानी, पापी लोकांना यमरूपाने भयावह, जितेंद्रिय, आपल्या भक्तांना विषयाच्या गुलामगिरीतून सोडविणारा, सत्पात्री दानाने संतुष्ट होणारा, सात्त्विक दानस्वरूप, वनविहारी, दावाग्निरूप, सेवकांचा पालक, पत्नीचे ग्रहण न करणारा संन्यासी (अशा दत्ताला वंदन असो.)५५. दिक्पालरूप, सूर्यस्वरूप, दिग्गजरूप, ईश्वरी योगाने युक्त, दिगंबर, देवरूप, कालात्मक, दिनरूप, दिशांमधून प्रकट होणारा, दिव्य शरीर धारण करणारा, प्रह्लादादि दैत्यांनी संपूजित (अशा दत्ताला वंदन असो.)५६.

**दीनपं दीधितिं दीप्तं दीर्घं दीपं च दीप्तगम् । दीनसेव्यं दीनबन्धुं दीक्षादं दीक्षितोत्तमम् ।।५७।।**
**दुर्ज्ञेयं दुर्ग्रहं दुर्गं दुर्गेशं दुःखभंजनम् । दुष्टघ्नं दुग्धपं दुःखं दुर्वासोऽग्र्यं दुरासदम् ।।५८।।**
**दूतं दूतप्रियं दूष्यं दूष्यत्रं दूरदर्शिपम् । दूरं दूरतमं दूर्वाभं दूराङ्गं च दूरगम् ।।५९।।**
**देवार्च्यं देवपं देवं देयज्ञं देवतोत्तमम् । देहज्ञं देहिनं देशं देशिकं देहिजीवनम् ।।६०।।**

दीन+पं, दीधितिं, दीप्तं, दीर्घं, दीपं च दीप्त+गुं, दीन+सेव्यं, दीन+बन्धुं, दीक्षा+दं, दीक्षित+उत्तमं (वन्दे)।५७। दुः+ज्ञेयं, दुः+ग्रहं, दुः+गं, दुर्गा+ईशं, (दुर्ग+ईशं), दुःख+भञ्जनं, दुष्ट+घ्नं दुर्वासः+अग्र्यं, दुः+आसदं (वन्दे)।५८। दूतं, दूत+प्रियं, दूष्यं, दूष्य+त्रं, दूर+दर्शि+पं, दूरं, दूरतमं, दूर्वा+आभं, दूर+अङ्गं च दूर+गं (वन्दे)।५९। देव+अर्च्यं, देव+पं, देवं, देय+ज्ञं, देवता+उत्तमं, देह+ज्ञं, देहिनं, देशिकं, देहि+जीवनं (वन्दे)।६०।

दीननाथ, किरणरूप, तेजस्वी, देदीप्यमान दृष्टीचा, दीनांना सेव्य, दीनबंधू, दीक्षादाता, दीक्षितांमध्ये श्रेष्ठ (अशा दत्ताला वंदन असो).५७. *'गुहाहितं गह्वरिष्ठं'* या श्रुतीनुसार जाणण्यास कठीण, (मन, वाचा आणि इंद्रियें यांना) अप्राप्य, उमापति शिवस्वरूप किंवा मानवी शरीररूप दुर्गाचे रक्षण करणारा, दुःखभंजक, दुष्टसंहारक, (वांझ महिषी दुभती करून तिचे) दूध पिणारा, (स्वकर्मार्जित) दुःखस्वरूप, दुर्वासमुनींचा ज्येष्ठ भ्राता आणि दुष्प्राप्य (अशा दत्ताला वंदन असो).५८. (अग्निरूपाने देवांचा) दूत, (हनुमान, उद्धव आदि आपल्या) दूतांना प्रिय असणारा, वाळवंटांत राहुटीसारखा आश्रयभूत, पतितपावन, दूरदर्शी विद्वानांचा ईश्वर, इंद्रियांपासून दूर असलेला, बहिर्मुख जीवांना कोटिकल्पांतही अलभ्य, दूर्वांकुराप्रमाणे तेजस्वी, त्रैलोक्यव्यापी अशा विशाल देहाचा आणि दोन पायांत ब्रह्मांड ओलांडणारा (अशा दत्ताला वंदन असो).५९. देवांना पूज्य, देवांचा पालक, देवांचा देव, सर्वश्रेष्ठ दैवत, देहरूपी क्षेत्राचा ज्ञाता (क्षेत्रज्ञ), स्वमायेने लीलादेह धारण करणारा, शास्त्राज्ञास्वरूप, मार्गदर्शक गुरू, देहधाऱ्यांना जीवनस्वरूप (अशा दत्ताला वंदन असो).६०.

**दैन्यं दैन्यहरं दैवं दैन्यदं दैविकांतकम् । दैत्यघ्नं दैवतं दैर्घ्यं दैवज्ञं दैहिकार्तिदम् ।।६१।।**
**दोषघ्नं दोषदं दोषं दोषित्रं दोर्द्वयान्वितम् । दोषज्ञं दोहपं दोषेड्बन्धुं दोर्ज्ञं च दोहदम् ।।६२।।**
**दौरात्म्यघ्नं दौर्मनस्य-हरं दौर्भाग्यमोचनम् । दौष्ट्यत्रं दौष्कुल्यदोष-हरं दौर्हृद्यभञ्जनम् ।।६३।।**

दैन्यं, दैन्य+हरं, दैवं, दैन्य+दं, दैविक+अन्तकं, दैत्य+घ्नं, दैवतं, दैर्घ्यं, दैव+ज्ञं, दैहिक+आर्तिदं (वन्दे)।६१। दोष+घ्नं, दोष+दं, दोषं, दोषि+त्रं, दोः+द्वय+अन्वितं, दोष+ज्ञं, दोह+पं, दोषेड्+बन्धुं, दोः+ज्ञं, च दोहदं (वन्दे)।६२। दौरात्म्य+घ्नं, दौर्मनस्य+हरं, दौर्भाग्य+मोचनं, दौष्ट्य+त्रं, दौष्कुल्य+दोष+हरं, दौर्हृद्य+भञ्जनं (वन्दे)।६३।

दुष्कर्मकर्त्यांना दैन्यस्वरूप, भक्तांचे दैन्य हरण करणारा, कृतकर्मांचा फलस्वरूप, भाग्यहीनांना दैन्य देणारा, आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक तापांचे शमन करणारा, विष्णुरूपाने दैत्यांचा संहारक, दैवतस्वरूप, साक्षात महानता, ज्योतिषज्ञ, देहदुःख नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६१. भक्तांचा उद्धार करण्यासाठी त्यांचे चित्तदोष घालविणारा, पापी लोकांची मने दोषांनी युक्त करणारा तसेच त्यांच्या कर्मानुसार कफादि दोषस्वरूप, शरण आलेल्या अपराध्यांचा त्राता, द्विभुज (चतुर्भुज आणि षड्भुजही), सर्व जीवांचे दोष जाणणारा, (वंध्या महिषीचे) दोहन करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीचा पालक, चंद्राचा भाऊ, कोट्यवधी भुजांचा ज्ञाता, (व्रजांतील) गाईंचे दोहन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६२. दुःस्वभाव नाहीसा करणारा, मनाचे विकार दूर करणारा, दुर्भाग्याचे निवारण करणारा, (मनाच्या) दुष्टपणापासून रक्षण करणारा, कुलहीनत्वाचा दोष घालविणारा, हृदयाचे काठिण्य नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६३.

**दण्डज्ञं दण्डिनं दण्डं दम्भघ्नं दम्भिशासनम् । दन्त्यास्यं दन्तुरं दंशि-घ्नं दण्ड्यज्ञं च दण्डदम् ।।६४।।**
**अनन्तानन्तनामानि सन्ति तेऽनन्तविक्रम । वेदोऽपि चकितो यत्र नुर्वाग्हृद्दूर का कथा ।।६५।।**
**नामरूपगुणातीत भेदसङ्गविवर्जित । एक एवाद्वितीयोऽसि परमात्मन् हि नाकवत् ।।६६।।**

दण्ड+ज्ञं, दण्डिनं, दण्डं, दम्भ+घ्नं, दम्भि+शासिनं, दन्त्य+आस्यं, दन्तुरं, दंशि+घ्नं, दण्ड्य+ज्ञं च दण्ड+दं (वन्दे)।६४। (हे) अनन्त, अनन्त+विक्रम, ते अनन्त+नामानि सन्ति। यत्र वेदः अपि चकितः, (हे) वाक्+हृत्+दूर, नुः का कथा?।६५। (हे) नाम+रूप+गुण+अतीत, (हे) भेद+सङ्ग+विवर्जित, परमात्मन्, नाकवत् एक एव अद्वितीयः असि।६६।

दण्डनीतिज्ञ, दण्डधारी संन्यासी, अपराध्यांना दण्डस्वरूप, दंभहारक, दंभी माणसाला शासन करणारा, गजमुख अर्थात् गणेशस्वरूप, करालदंष्ट्र, मधमाशी इत्यादींची पीडा निवारणारा, शासनार्ह अपराध्यांना ओळखणारा तसेच त्यांना शासन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६४. हे अनंता, तुझे अगणित विक्रम असल्याने तुझी नावेही अनंत आहेत. वाणी आणि मनाला अगोचर असणाऱ्या देवा, वेदही जिथे चकित होतात तिथे मानवांची काय कथा?६५. नाम, रूप, गुण या सर्वांच्या पलीकडे असणाऱ्या, स्वगत, सजातीय आणि विजातीय भेद आणि मायासंग यांच्या वेगळा आकाशासारखा एकमेवाद्वितीय असा तू परमात्मा आहेस.६६.

**नामरूपगुणाभेदा मायासक्तिरनेकता । कल्पिता स्थूलधीभिस्ते महाकाशादिवद्विभो ।।६७।।**
**बहुरूपाप्रमेया ते मायैषा जगदीश्वर । मन्यते मेऽहमित्यस्या रममाणो गुणेष्वसौ ।।६८।।**
**कारणं त्विदमेवात्र जगद्विपरिवर्तने । येषां नाव्यक्त गम्योऽसि त्वमेव परमा गतिः ।।६९।।**

(हे) विभो! स्थूल+धीभिः ते नाम+रूप+गुणा भेदा मायासक्तिः अनेकता महा+आकाशवत् कल्पिता।६७। (हे) जगत्+ईश्वर, एषा बहुरूपा अप्रमेया ते माया। अस्या रममाणो असौ, अहं, मे इति मन्यते।६८। इदं एव अत्र जगत्+विपरिवर्तने कारणम्। (हे) अव्यक्त येषां त्वं एव परमा गतिः (इति) न गम्यः असि।६९।

नाम, रूप, गुण, भेद आणि मायेची आसक्ती हे सर्व स्थूलबुद्धीच्या (सगुणनिष्ठ) लोकांनी तुझ्या ठायीं कल्पिलेले आहेत. जसे एका महाकाशाचे ठायी जलाकाश, घटाकाश अशी नावे देऊन त्या त्या उपाधीच्या अनुषंगाने त्या त्या रूपाची, आकाराची कल्पना केली जाते. ही कल्पनाही तात्त्विक नसून अज्ञानमूलक कल्पनेचाच खेळ आहे. त्याचप्रमाणे किंवा ज्ञानी पुरुषांनी शुद्ध स्वरूप जाणण्यासाठी विकल्प किंवा त्याचा अभाव या दोन्हींनी अस्पृष्ट आत्मवस्तूला जाणण्यासाठी चंद्रशाखान्यायाने कल्पिलेल्या आहेत (पंचशील १:५२). हे जगदीश्वर, अंश आणि गुण यांच्या वैविध्याने नानारूपांनी नटलेली ही तुझी माया, कोणत्याही प्रमाणांनी जाणतां येत नाही; तिच्या कार्यावरून तिचे अनुमान करतां आले तरी ही खरी आहे की खोटी असा निश्चय करतां येत नाही. म्हणजेच ती अनिर्वचनीय आहे. ह्या मायेच्या गुणांत देहादिकांच्या अध्यासाने भुलून पुरुष मी आणि माझे ह्या मोहांत पडतो.६७-६८. हेच अहंकार आणि ममता जगाच्या सतत उलाढालीचे कारण आहे. पण हे अव्यक्ता, तूच त्यांची अंतिम गति आहेस हे ते जाणत नाहीत.६९.

**आसत्यलोका लोकास्ते पुनरावर्तिनोऽक्षर । तस्मात्त एव धन्याः स्युर्गृहीतं धाम यैस्तु ते ।।७०।।**
**नानुमानेन ते धाम ग्रहीतुं शक्यते ह्यतः । मृग्योऽसि पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः ।।७१।।**

(हे) अक्षर! ते आसत्यलोकाः लोकाः पुनः+आवर्तिनः। तस्मात् यैः ते धाम गृहीतं ते एव धन्याः स्युः।७०। ते धाम अनुमानेन ग्रहीतुं न शक्यते। अतः पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः असि।७१।

**ब्रह्मलोकाचे दोन प्रकारः-** परमश्रेष्ठ सत्य(ब्रह्म)लोकापर्यंतच्या, सर्वही लोकांपासून (मनुष्यदेहांत) परतावे लागते. (शंका) 'सत्यलोकाला जाणाऱ्या ब्रह्मज्ञाच्या स्वागतासाठी हातांत चामर, माला, अंजन, वस्त्र आणि फळे घेऊन शंभर शंभर अशा पांचशे अप्सरा धांवतात, त्याला ब्रह्मालंकाराने भूषवितात; असा ब्रह्मालंकृत ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप होतो. स्वाराज्य प्राप्त होऊन तो जीव ब्रह्मदेवाबरोबर कल्पांतीं मुक्त होतो' असे श्रुति आणि स्मृतींत वर्णन आहे. ब्रह्मसूत्रांतही (४-२-१०) ह्याची पुष्टी केलेली आहे. काठकश्रुतीतही (२-३-५) ब्रह्मलोकांत ऊनसावलीप्रमाणे ब्रह्मत्वाची स्पष्ट प्रतीति होते असे म्हटले आहे. मग अशा ब्रह्मलोकापासून पुन्हा भूलोकाला यावे लागते असे कसे म्हटले? या शंकेचे समाधान सांगतात. ब्रह्मलोक दोन प्रकारचा आहे. एक क्रममुक्तीच्या साधकांना मिळणारा आणि दुसरा पुण्यकर्माने मिळणारा. यांतील जे पुण्याईच्या बळावर ब्रह्मलोकांत जातात त्यांना त्यांच्या पुण्याचा उपभोग झाल्यावर पुनर्जन्म प्राप्त होतो; कारण त्यांनी ज्ञानाचे साधन केलेले नसते. ज्ञानप्राप्तीचा साधक मात्र ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतो असा अभिप्राय. अशा रीतीने ज्यांनी तुझे रूप आत्मभावाने ग्रहण केले, जे तुझ्याशी एकरूप झाले ते खरोखर धन्य होत.७०. ते तुझे स्वरूप तर्काने जाणतां येत नाही. (कारण अनुमानाने केवळ 'त्वं'पदाचा अर्थ कळूं शकतो.) त्यामुळे बुद्ध्यादिकांच्या साह्याने जागरूक राहणारा मानवच तुझा शोध घेऊं शकतो.७१.

**पुंस्त्वेऽप्यर्क इवान्धानां गोकल्पानामतीन्द्रिय । स्वप्नेऽपि नैव ते वार्ता पुनः प्रत्यक्षता कुतः ॥७२॥**
**प्रेष्ठत्वद्भक्तसंयोग-विवेकामलदृष्टिभिः । साङ्ख्ययोगपरैर्धीरैः क्रमात्ते धाम गम्यते ॥७३॥**
**तस्माद्दत्तं नृजन्मेदं त्वया दिष्ट्याऽमृतक्षमम् । सद्दृष्टिदानाद्भगवंस्तत्साफल्यं कुरु प्रभो ॥७४॥**
**त्वत्प्रेमभक्त्यैव सदा मदात्मा धिया धियं दृष्टिमपीश दृष्ट्या ।**
**अंगैः सदाङ्गानि दृढं दयाब्धे हरे निबध्नात्विति मेस्ति याच्ञा ॥७५॥**

(हे) अति+इन्द्रिय, पुंस्त्वे अपि गो+कल्पानां, अन्धानां अर्क इव, स्वप्ने अपि ते वार्ता न एव। पुनः प्रत्यक्षता कुतः?७२। प्रेष्ठ+त्वत्+भक्त+संयोग+विवेक+अमल+दृष्टिभिः साङ्ख्य+योग+परैः ते धाम क्रमात् गम्यते।७३। (हे) भगवन् इदं अमृत+क्षमं नृ+जन्म त्वया दिष्ट्या दत्तम्। (हे) प्रभो, सत्+दृष्टि+दानात् तत्+साफल्यं कुरु।७४। (हे) हरे, मत्+आत्मा त्वत्+प्रेम+भक्त्या एव, (मे) धियं (त्वत्) धिया, दृष्टिं अपि दृष्ट्या, अङ्गानि अङ्गैः सदा दृढं निबध्ना अस्तु इति याच्+ञा।७५।

हे इंद्रियातीत प्रभो, मानवांतसुद्धां जे पशुतुल्य आहेत त्यांना तुझी स्वप्नांतही वार्ता नसते; मग प्रत्यक्ष अनुभूतीची काय गोष्ट? साकार ब्रह्मनिष्ठाही दुर्लभ आहे मग मोक्षाची काय वार्ता असा भाव. कारण मोक्ष केवळ ज्ञानानेच प्राप्त होतो; त्याला दुसरा मार्गच नाही असे श्रुति (महावाक्योपनिषद् ३; श्वेताश्वतर उ. ३-८) म्हणते.७२. तुझ्या प्रियतम भक्तांचा सत्संग आणि विवेक ह्या दोन निर्मल डोळ्यांच्या साह्याने ज्ञानयोग आणि निष्कामकर्मयोग यांचे अनुष्ठान यमनियमादि साधनांसह करणाऱ्याना श्रवण-मनन-निदिध्यासनादि क्रमाने तुझे स्वरूप प्राप्त होते.७३. त्यासाठी हे भगवंता, दत्तप्रभो, आपण आमच्या भाग्याने हा मोक्षयोग्य मानवजन्म दिलेला आहे त्याचे साफल्य होण्यासाठी (वरीलप्रमाणे) निर्मल नेत्रांचे दान आपण करा.७४. हे हरे, तुझ्या प्रेमभक्तीने माझे मन, तुझ्या बुद्धीने माझी बुद्धी, दृष्टीने दृष्टी तसेच तुझ्या सर्व अंगांनी माझी अंगे सदैव निबद्ध असोत. तुझा आणि माझा परस्परवियोग अंशतःसु--दोर कधीच होऊं नये.७५.

**पादौ त्वदीयालयतीर्थयात्राविहारिणावर्चनतत्परौ मे ।**
**करौ रसज्ञापि भवत्वजस्रं सत्त्वत्कथोद्धातरसज्ञतोत्का ।।७६।।**
**त्वत्पादपद्मच्युतपुष्पगन्धं नासा भजत्वक्षियुगं गुणात्मन् ।**
**त्वन्मूर्तिमासेचनकां श्रुती मे श्राव्यास्त्वदीया भगवन्कथाश्च ।।७७।।**
**त्वदीयभक्ताङ्घ्रिमलाब्जपूतां धूलिं मदङ्गानि सदा वहन्तु ।**
**मनस्तुरङ्गो निवसत्वजस्रं त्वय्येव दीपोऽङ्ग यथा निवाते ।।७८।।**

मे पादौ त्वदीय आलय+तीर्थ+विहारिणौ, मे करौ अर्चन+तत्परौ, रसज्ञा अपि अजस्रं सत्+त्वत्+कथ+उद्धात+रसज्ञता+उत्का भवतु।७६। नासा त्वत्+पाद+पद्म+च्युत+पुष्प+गन्धं भजतु। (हे) गुण+आत्मन्, (मे) अक्षि+युगं आसेचनकां त्वत्+मूर्तिं भजतु।७७। (हे) भगवन्, मे श्रुतीः च त्वदीया श्राव्या कथाः (भजन्तुर)। मत्+अङ्गानि सदा त्वदीय+भक्त+अङ्घ्रि+अमल+अब्ज+पूतां धूलिं वहन्तु। तुरङ्गः मनः, यथा निवाते दीपः, अजस्रं त्वयि एव निवसतु।७८।

ह्या माझ्या शरीराचा विनियोग सर्वतोपरी तुझ्या सेवेतच व्हावा यासाठी प्रार्थना करतात. माझे मन तुझ्याच प्रेमभक्तीशी, बुद्धी तुझ्या बुद्धीशी, दृष्टी दृष्टीशी, सर्व अंगे तुझ्या अंगांशी सतत घट्ट जडलेले राहोत.७५. माझे पाय तुझ्याच मंदिरांच्या व तीर्थांच्या यात्रांत विचरण करोत. माझे हात तुझ्या पूजनांत तत्पर होवोत. माझी जिह्वा तुझ्या सत्कथांच्या गीतांचा स्वाद जाणून त्यांच्या उद्घोषासाठी सदैव आतुर असो.७६. माझे नाक तुझ्या पायांवरून पडलेल्या फुलांचा गंध सेवन करो. जिला पाहून मन कधी भरतच नाही अशी तुझी मनोहर मूर्ति सतत माझ्या दृष्टीसमोर राहो.७७. तुझ्या भक्तांच्या पदकमलांनी पवित्र झालेल्या धुळीने माझे शरीर सदैव माखलेले असो. सतत धांवणारा हा मनरूपी घोडा तुझ्या ठायी निवातींच्या दीपाप्रमाणे स्थिर राहो. वाऱ्याची झुळकही जेथे येत नाही अशा ठिकाणी दिव्याची ज्योत जशी निश्चळ राहते तसे संकल्पापासून निपजणाऱ्या सर्व कामांचा त्याग करून, अभ्यास आणि वैराग्य यांच्या बळाने हळू हळू उपरमलेले माझे चित्त तुझ्या ठायी स्थिर होवो. म्हणजेच धर्ममेघ नांवाच्या निर्बीज समाधीची सिद्धि होवो ही प्रार्थना.७८.

**शिरो नमत्वीश्वर तेऽङ्घ्रिपद्मं देहः सदाऽऽलिङ्गयतु त्वदर्चाम् ।**
**एषा त्वदीयैव तनुस्त्वमेव संबन्धिनो मे नहि केऽद्वितीय ।।७९।।**
**नूनं भवानृषिर्नैव न वर्णाश्रमलिङ्गभाक् । निर्मितं भवतैवेदं विश्वं स्वांशांशतोऽखिलम् ।।८०।।**
**न जानन्ति भवन्माया-मोहिता दिव्यमुत्तमम् । भवद्धामात एवैते भ्रमन्त्यसुरभावगाः ।।८१।।**

(हे) ईश्वर, शिरः ते अङ्घ्रि+पद्मं नमतु। देहः सदा त्वत्+अर्चां आलिङ्गयतु। एषा तनुः त्वदीय एव। (हे) अद्वितीय, त्वं एव मे सम्बन्धिनः, न हि के (अपि त्वत्तः अन्याः)।७९। भवान् ऋषिः न एव, न वर्ण+आश्रम+लिङ्ग+भाक्। भवता एव इदं अखिलं विश्वं स्व+अंशतः निर्मितम्।८०। भवत्+माया+मोहिताः दिव्यं उत्तमं भवत्+धाम न जानन्ति। अत एव ते असुर+भाव+गाः भ्रमन्ति।८१।

ईश्वरा, माझे मस्तक तुझ्याच चरणीं नत असो, माझा देह सतत तुझ्या मूर्तीच्या आलिंगनांत राहो. ही माझी तनु तुझीच आहे. अद्वितीया, तुझ्यावांचून कोणीही माझे नाही.७९. आपण म्हणाल की माझी एका ऋषिपुत्राची का एवढी आळवणी करतोस?' तर खरोखर आपण ऋषिपुत्र नाहीत. तसेच आपल्याला वर्ण, आश्रम, लिंग आदींचा कांही संबंध नाही. वर्णाश्रमादि देहाच्या ठिकाणी मायेने कल्पिलेले आहेत. आपण आत्मस्वरूप आहां. *'असंगो न हि सज्जते'* (बृहदारण्यक उपनिषद् ४-५-१५) ह्या श्रुतीनुसार त्याचा देहादि उपाधीशी कांही संबंध नाही. कूटस्थ प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार झालेलाही वर्णाश्रमलिंगाच्या पलीकडे जातो. आपण तर लीलेने देह धरला आहे. मग आपण वर्णाश्रमादींच्या अतीत आहे हे काय सांगायला हवे? आपणच ह्या नामरूपात्मक विश्वाचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहां आणि ब्रह्मदेवांच्या करवी आपणच हे जगत् रचले आहे.८०. आपल्या मायेने मोहून जाऊन असुरभावापन्न झालेले आपले उत्तम आणि दिव्य स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळेच ते संसारचक्रांत भ्रमण करतात.८१.

**कर्ता भर्तासि हर्ता त्वं प्रत्यक्षं तत्त्वमस्यपि । भो सर्वं खल्विदं ब्रह्म त्वमस्यात्मासि केवलम् ।।८२।।**
**त्वदुदेति रमत्येतद्विश्वं त्वय्येव लीयते । अष्टमूर्तिभिराभिस्त्वमाभासीव जगन्मयः ।।८३।।**
**दिक्पाला लोकपालाश्च श्रूयते दृश्यतेऽखिलम् । चराचरं जगल्लोका विष्णो तेऽवयवा अमी ।।८४।।**
**निगूढतत्त्व ते ज्ञातं यत्किञ्चिल्लोकदुर्ग्रहम् । चेष्टितं ते प्रसादोऽयं प्राक्पुण्यैर्मय्युपस्थितः ।।८५।।**

त्वं कर्ता, भर्ता, हर्ता, प्रत्यक्षं तत्त्वं अपि असि। भो त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म, केवलं आत्मा असि।८२। एतत् विश्वं त्वत् उदेति, रमति, त्वयि एव लीयते। त्वं अष्ट+मूर्तिभिः जगत्+मयः इव आभासि। (हे) विष्णो, दिक्+पालाः लोक+पालाः च अखिलं चर+अचरं जगत् (यत्) श्रूयते, दृश्यते, अमी ते अवयवयाः।८४। (हे) निगूढ+तत्त्व, ते लोक+दुः+ग्रहं चेष्टितं यत् किञ्चित् ज्ञातं अयं ते प्रसादः मयि प्राक्+पुण्यैः उपस्थितः।८५।

सगुणरूपाने तूच या सृष्टीचा कर्ता, पोशिंदा आणि संहर्ता आहेस. तूच प्रत्यक्ष तत्त्वस्वरूप आहेस. हे सर्व जग तूच आहेस; तुझ्याच अधिष्ठानावर ते भासत आहे. तूच परब्रह्म आहेस. हा श्लोक मंत्रगर्भ आहे.८२. *'यतो वा इमानि भूतानि...'* ह्या श्रुतिवचनानुसार (तैत्तिरीय उपनिषद् ३-१) हे सर्व जगत् तुझ्यापासून उदय पावते, तुझ्यांतच रमते आणि तुझ्यांतच विलीन होते. पृथ्वी, आप, अग्नि, सूर्य, चंद्र, वायु, आकाश आणि जीवात्मा ह्या अष्टमूर्तींच्या रूपाने भासणारा विश्वात्मक तूच आहेस (*'इव'* शब्दाने ते तत्त्वतः तसे नाही हे सूचित केले आहे.).८३. इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मदेवादि लोकपाल, सर्व चराचर जगत्, हे अनुभवाला येणारे जगत्, वेदांनी वर्णिलेले स्वर्गादि सप्तलोक, सप्तपाताल हे सर्व, हे विष्णो, तुझेच अवयव आहेत. कारण तूच विराट स्वरूपाने हे सर्व धारण करतोस.८४. हे निगूढतत्त्व (अविज्ञेयस्वरूप), लोकांना दुर्बोध असणाऱ्या तुझ्या लीला किंचित् मात्र मला समजल्या हा तुझाच प्रसाद होय.८५.

**सुखमैन्द्रियकं क्वापि न कांक्षे ते पदाश्रितः । नाकादीन्न प्रशंसामि नैव निन्दामि नारकान् ।।८६।।**

**यथेच्छं क्वापि मां कर्म-योगात्स्थापय विश्वभृत् । मां यत्र क्वापि ते भक्तिर्न जहात्विति काङ्क्षितम ।।८७।।**

**स्तुवन्तु निन्दत्वपि ताडयन्तु मां पूजयन्त्वत्र जना न वापि ।**

**देहः पतत्वद्य युगान्तरे वा न किञ्चिदिष्टं न च मेऽप्यनिष्टम् ।।८८।।**

**हृद्ध्यात्मेन्द्रियवाक्कायैः सदा प्रकृतिभावतः । यद्यत्करोम्यर्पयामि परात्मन्दत्त सर्व ते ।।८९।।**

ते पद+आश्रितः क्व अपि ऐन्द्रियकं सुखं न काङ्क्षे। नाकादीन् न प्रशंसामि, न एव नारकान् निन्दयामि।८६। (हे) विश्वभृत्, मां कर्म+योगात् यथा+इच्छं क्व अपि स्थापय, यत्र क्व अपि ते भक्तिः न जहातु इति काङ्क्षितम्।८७। जनाः मां स्तुवन्तु, निन्दन्तु, अपि वा ताडयन्तु, न वा पूजयन्तु; देहः अद्य, युग+अन्तरे वा पततु; मे न किञ्चित् इष्टं न च अपि अनिष्टम्।८८। (हे) पर+आत्मन् दत्त, हृत्+धी+आत्म+इन्द्रिय+वाक्+कायैः सदा प्रकृति+भावतः यत् यत् करोमि, सर्वं ते अर्पयामि।८९।

आपल्या पदांचा आश्रय लाभल्यावर आतां मी कसल्याही ऐंद्रिय (भौतिक) सुखाची इच्छा करीत नाही. मी न स्वर्गादिकांना नावाजतो न नरकांची निंदा करतो.८६. हे जगाच्या पोषका, कर्मयोगानुसार (माझ्या कर्मगतीनुसार) मला जिथे कुठे ठेवायचे ते ठेव. तुझ्या भक्तीला मात्र मी कधी पारखा होऊ नये हीच माझी प्रार्थना आहे.८७. लोक माझी स्तुति करोत की निंदा; माझी पूजा करोत की मला चोप देवोत; हा देह आजच पडो वा युगानंतर! मला कांही इष्ट नाही की अनिष्ट नाही.८८. हे दत्त परमात्मन्, मनाने, बुद्धीने, शरीराने वा स्वाभाविक प्रकृतीने मी जे जे करतो ते सर्व तुला अर्पण असो. मन, बुद्धी, अहंकार, दहा इंद्रिये, वाचा (विशिष्ट वाचिक कर्माच्या निर्देशासाठी वेगळा उल्लेख) आणि काया तसेच स्वभावतः जी लौकिकादि कर्मे मी करतो ती सर्व हे दत्ता, तुला समर्पण करतो.८९.

**लीलात्मना योऽत्रिगृहेवतीर्णो दत्ताख्य उन्मत्तपिशाचवद्यः ।**
**बालो युवा क्वापि जरन्जटाभृत् क्वचिदृषिर्व्यक्तपरीक्षितश्च ।।९०।।**
**त्यागी सुभोगी क्वचिदस्ति संगी योगी सुवासाः क्वचिदस्ति नग्नः ।**
**तुष्टः कृशः पुष्ट इह क्वचिद्यो दंडी च भिक्षुः क्वचिदस्ति वर्णी ।।९१।।**
**गृही वनी वर्णविरुद्धचेष्टः क्वचिच्च वर्णाश्रमधर्मयुक्तः ।**
**इत्यादयो यस्य विचित्रचेष्टा देवर्षिहृद्वागयनं व्यतीताः ।।९२।।**

यः दत्त+आख्यः लीला+आत्मनः अत्रि+गृहे अवतीर्णः, यः उन्मत्त+पिशाचवत्, बालः, युवा, क्व अपि जटा+भृत् जरन्, क्वचित् व्यक्त+परीक्षितः ऋषिः, त्यागी, सुभोगी, क्वचित् संगी अस्ति, (क्वचित्) सुवासाः क्वचित् नग्नः अस्ति; यः इह क्वचित् तुष्टः, कृशः, पुष्टः; क्वचित् दंडी भिक्षुः (क्वचित्) वर्णी अस्ति।९१। क्वचित् गृही, (क्वचित्) वर्णी, वर्ण+विरुद्ध+चेष्टः क्वचित् च वर्ण+आश्रम+धर्म+युक्तः। यस्य इत्यादयः विचित्र+चेष्टाः देव+ऋषि+हृत्+वाक्+अयनं व्यतीताः।९२।

जो अत्रींच्या घरांत लीलादेह धारण करून अवतरला; (जो) भक्तांची परीक्षा पाहण्यासाठी (ज्ञान व ऐश्वर्य यांनी संपन्न असूनही) बाल, उन्मत्त आणि पिशाचवत् वर्तन करतो; कधी बाल, कधी युवा, कधी जटाधारी वृद्ध तर कधी लोकांनी प्रकट पाहिलेला ऋषि; कधी योगी, कधी उत्तम वेषांत तर कधी नग्न; कधी तुष्ट, कधी पुष्ट तर कधी कृश; कधी दंडधारी संन्यासी, कधी भिक्षु (दंडरहित परमहंस), कधी ब्रह्मचारी, कधी गृहस्थ, कधी वानप्रस्थ, कधी वर्णाश्रमांच्या विरुद्ध वागणारा तर कधी परत वर्णाश्रमांना धारण करणारा; इत्यादि ज्याच्या अनेक प्रकारच्या अदभुत लीला देव आणि ऋषींच्यासुद्धां मन आणि वाचा यांना न आकळणाऱ्या आहेत (मानवांचा काय पाड?).९०-९२.

**यो भक्तरक्षाक्षण एव यस्य वै सेवा स्मृतिर्भोज्यनिवेदनं धिया ।**
**पूजाफलं योऽर्पयतीह दुर्लभं भक्तस्मृतौ संनिधिकृत्क्षणे क्षणे ।।९३।।**
**यस्यास्ति माहुरे निद्रा निवासः सह्यपर्वते । भागीरथ्यां सदा स्नानं ध्यानं गन्धर्वपत्तने ।।९४।।**
**कुरुक्षेत्रे चाचमनं धूतपापेश्वरे तथा । विभूतिधारणं संध्या करहाटे श्रियः पुरे ।।९५।।**
**भिक्षा विठ्ठलपुर्यस्य सुगन्धिद्रव्यधारणम् । भुक्तिः सारपुरे सायं-संध्या पश्चिमसागरे ।।९६।।**

यः भक्त+रक्ष+क्षणः, यस्य वै स्मृतिः एव सेवा, धिया भोज्य+निवेदनं पूजा, यः इह दुर्लभं फलं अर्पयति, भक्त+स्मृतौ संनिधि क्षणे क्षणे संनिधि+कृत्।९३। यस्य निद्रा माहुरे अस्ति, निवासः सह्य+पर्वते, सदा भागीरथ्यां स्नानं, गन्धर्व+पत्तने ध्यानं, कुरुक्षेत्रे च आचमनं, तथा धूतपापेश्वरे विभूतिधारणं, करहाटे संध्या, श्रियः पुरे भिक्षा, अस्य विठ्ठलपुरि सुगन्धि+द्रव्य+धारणं, सारपुरे भुक्तिः, पश्चिम+सागरे सायं+संध्या (अस्ति)।९४-९६।

आपल्या भक्तांचे रक्षण करणे हाच ज्याचा आनंदोत्सव आहे, केवळ स्मरण हीच ज्याची सेवा आहे, आपले अन्न (स्वतः सेवन करण्याआधी) त्याला भक्तीने समर्पण करणे हीच ज्याची पूजा आहे आणि अशा अर्चकांच्या भक्तीने प्रसन्न होऊन जो तपादिकांनीही दुर्लभ असे फळ देतो. भक्तांनी स्मरतांच त्यांच्या निकट उभा राहणारा (तो दत्त परमात्मा).९३.

**दत्तात्रेयांची दिनचर्या.**

जो माहूरगडावर झोंपतो, सह्यशिखरावर राहतो, गंगाभागीरथींत नित्य स्नान करतो, गाणगापुरीं ध्यान करतो, कुरुक्षेत्रांत आचमन करतो, (हिमालयाच्या पायथ्याशी) धूतपापेश्वरला भस्म धारण करतो, कऱ्हाडला संध्या करतो, कोल्हापुरामध्ये भिक्षा करतो, पंढरपुरामध्ये सुगंधि द्रव्य धारण करतो, पांचालेश्वरीं भोजन करतो आणि पश्चिमसागराच्या तटावर सायंसंध्या करतो.९४-९६.

**स एष भगवान्दत्तः सदा वसतु मे हृदि । हृद्धीन्द्रियादिव्यापारे सदा तत्स्मृतिरस्तु मे ।।९७।।**
**पादादि मूर्धपर्यन्तमेतद्वै भौतिकं वपुः । परिरक्षतु विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः ।।९८।।**
**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यदृग्योपि शृणोत्यकर्णः ।**
**यो वेत्ति वेद्यं न हि यस्य वेत्ता सोऽग्र्यः प्रधानः पुरुषो हि दत्तः ।।९९।।**

सः एषः भगवान् दत्तः सदा मे हृदि वसतु। हृत्+धी+इन्द्रियादि+व्यापारे सदा मे तत् स्मृतिः अस्तु।९७। एतत् पादादि मूर्धपर्यन्तं भौतिकं वपुः विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः वै परिरक्षतु।९८। यः अ+पाणि+पादः ग्रहीता जवनः, अदृक् अपि पश्यति, अकर्णः शृणोति। यः वेद्यं वेत्ति। यस्य वेत्ता न हि। सः अग्र्यः प्रधानः पुरुषः दत्तः हि।९९।

तो हा भगवान् दत्त सदैव माझ्या अंतःकरणांत राहो, माझ्या मन, बुद्धी, इंद्रियें आणि देहाच्या सर्व क्रियांत मला त्याचे स्मरण राहो.९७. **कवच** - पायापासून मस्तकापर्यंत ह्या पांचभौतिक स्थूल आणि सूक्ष्म शरीराचे तो विश्वात्मक भगवंत सदा सर्व दिशांनी संरक्षण करो.९८. ज्याच्या सत्तेने थोटासुद्धां (देतो) घेतो, पांगळाही वेगाने धांवतो, आंधळा पाहतो, बहिरा ऐकतो; जाणण्यायोग्य सर्वांचा जो ज्ञाता आहे, पण त्याचा ज्ञाता कोणीही नाही (श्वेताश्वतर उपनिषद् ३:१९). कारण तो जाणीवेच्या पलीकडे आहे. तोही स्वतःला 'मी असा आहे', असे जाणत नाही. ह्यावर कुणी असे म्हणेल की मग तो सर्वज्ञ नाही तर तसे नाही. सशाचे शिंग माहीत नसल्याने सर्वज्ञत्वाला बाध येत नाही तसेच जाणीवेच्या पलीकडील स्वतःला न जाणल्याने परमात्म्याच्या सर्वज्ञत्वाला बाध येत नाही. तोच दत्त आद्य, श्रेष्ठ व अंतर्यामी पुरुष आहे.९९.

**आधारभूतः स्थिरजङ्गमानां क्षमास्वरूपस्थितिरस्ति नित्यम् ।**
**आप्यायते यो जगदप्स्वरूपी सर्वाघहृत्स्थास्नुचरिष्णु जीवः ।।१००।।**
**वैश्वानरात्माखिलदेहसंस्थः पचत्यसौ प्राणसखः सदान्नं ।**
**यो भास्वदात्माखिलकर्मसाक्षी विश्वं सदा चेतयते स्वभासा ।।१०१।।**

स्थिर+जङ्गमानां आधारभूतः क्षमा+स्वरूप+स्थितिः नित्यं अस्ति। यः सर्व+अघ+हृत् अप्+स्वरूपी जगत् आप्यायते। (यः) स्थास्नु चरिष्णु जीवः।१००। असौ अखिल+देह+संस्थः वैश्वानर+आत्मा प्राण+सखः सदा अन्नं पचति। यः भास्वत्+आत्मा अखिल+कर्म+साक्षी स्वभासा सदा विश्वं चेतयते।१०१।

**दत्तप्रभूचे अष्टमूर्तित्व** (श्लोक ८३ पहा.) सर्व चराचर सृष्टीचा आधार असणाऱ्या **पृथ्वी**च्या रूपाने तो नित्य स्थित आहे. तो **जल**रूपाने सर्व जगाची पुष्टि करतो, सर्व (कायिक, वाचिक, मानसिक) पापांचा नाश करतो तसेच सर्व स्थावर-जंगमांचा तो आत्मा आहे.१००. **जठराग्नी**च्या रूपाने सर्व देहांत (मानवांत त्रिकोणी, पशूंत चतुष्कोणी, पक्ष्यांत वर्तुलाकृति आणि मत्स्यादिकांत लंबवर्तुलाकार) राहून, हा (अपानसहित) प्राणाचा सखा सदैव अन्नाचे पचन करतो. अग्नीच्या वर पाणी आणि त्या पाण्यावर अन्न ठेवून, अग्नीच्या खाली स्वतः प्राण अग्नीला हळूंहळूं चेतवतो. *(ऊर्ध्वमग्नेर्जलं कृत्वाऽन्नं च जलोपरि। अग्नेश्चाधः स्वयं प्राणः स्थित्वाग्निं धमते शनैः।।* गरुडपुराण प्रेतखंड, धर्मकांड, ३२:४८-४९.) ह्या उक्त्यनुसार तसेच *अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्।।* (भ.गीता १५:१४) ह्या भगवद्वचनाला अनुसरून **सूर्या**च्या रूपाने आपल्या तेजाने सर्व विश्व सदा प्रकाशणारा, सर्व कर्मांचा साक्षी (हाच दत्तप्रभू आहे).१०१.

**योऽब्जो रसात्मा सकलौषधीर्वै पुष्णाति संतापहरोऽखिलेड्यः ।**
**क्षेत्रेषु भूत्वा दशधाखिलेषु प्राणात्मको यः पवतेऽखिलात्मा ।।१०२।।**
**आकाशरूपोऽखिलगोऽपि सौक्ष्म्याद्योऽभेदसङ्गः किल शब्दसंस्थः ।**
**भुनक्ति चोत्क्रामति तिष्ठतेऽपि मूढा विदुर्यं न सदात्मरूपं ।।१०३।।**

यः रस+आत्मा अब्जः संताप+हरः अखिल+ईड्यः वै सकल+औषधीः पुष्णाति। अखिलेषु क्षेत्रेषु दशधा भूत्वा यः प्राण+आत्मकः अखिलात्मा पवते।१०२। आकाश+रूपः अखिल+गः अपि सौक्ष्म्यात् यः अ+भेद+संगः किल शब्द+संस्थः भुनक्ति, उत्क्रामति च तिष्ठते अपि मूढा यं सत्+आत्म+रूपं न विदुः।१०३।

जो रसात्मक **चंद्र** होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो आणि जीवमात्रांचा दाह आपल्या शीतलतेने शमन करून सर्वांकडून स्तविला जातो. प्राणिमात्रांच्या देहांत दशधा होऊन (प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय) वाहणारा जो सूत्रात्मक **प्राण** आहे (*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्..* बृहदारण्यकोपनिषद् ३.७.२).१०२. जो आकाशरूपाने सर्वव्यापी, सूक्ष्मत्वाने अभेद आणि असंग आहे आणि ज्याच्या आश्रयाने शब्द राहतो. जीवरूपाने स्थित असलेल्या, सुखदुःखांचा भोग घेणाऱ्या आणि मृत्यूसमयीं देह सोडून जाणाऱ्या ज्याला अज्ञानी जाणत नाहीत. (*उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्। विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषा।।* (भ.गीता १५:१०).१०३.

**यः सर्वहृत्स्थोऽस्य यतः स्मृतिर्विद् वेदान्तकृद्योऽपि च वेदवेद्यः ।**
**समौ यदंशौ सयुजौ सुपर्णौ वृक्षाश्रितौ भुक्त्यवलोकनोत्कौ ।।१०४।।**
**स त्वं परात्मा पुरुषोत्तम श्रुति-ख्यातः समाविश्य जगत्त्रयं सदा ।**
**ईशाव्ययानन्त बिभर्षि दत्त ते पादाब्जयुग्माय नमोऽस्तु सर्वदा ।।१०५।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्क-युग्रक्ताब्जाभपत्तलः । गूढगुल्फः कूर्मपृष्ठोल्लसत्पादोपरिस्थलः ।।१०६।।**

यः सर्व+हृत्+स्थः यतः स्मृतिः वित्, यः अपि वेद+अन्त+कृत् च वेद+वेद्यः। वृक्ष+आश्रितौ यत्+अंशौ समौ, सयुजौ, सुपर्णौ भुक्ति+अवलोकन+उत्कौ।१०४। सः त्वं परात्मा पुरुष+उत्तमः श्रुति+ख्यातः (हे) ईश, (हे) अव्यय, (हे) अनन्त, (हे) दत्त जगत्+त्रयं समाविश्य बिभर्षि। ते पाद+अब्ज+युग्माय सर्वदा नमः अस्तु।१०५। वज्र+अङ्कुश+ध्वज+अब्ज+अङ्क+युक् रक्त+अब्ज+आभ+पत्+तलः, गूढ+गुल्फः कूर्म+पृष्ठ+उल्लसत् पाद+उपरि+स्थलः,।१०६।

जो सर्वांतर्यामी आहे, ज्याच्यापासून प्राणिमात्रांना स्मृती (पूर्वी अनुभवलेल्या विषयाचे स्मरण) आणि ज्ञान (विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगाची जाणीव) प्राप्त होतात, जो वेदांताचा कर्ता - ज्ञानदाता गुरू आणि संप्रदायाचा प्रवर्तक आहे आणि सर्व वेद विविध देवतारूपाने ज्याचे वर्णन करतात (किंवा जो उपनिषदांत वर्णन केलेला पुरुष आहे). चेतनत्वाने सम (सारख्या स्वभावाचे), सयुज (परस्पर मित्र), सुपर्ण (विश्वकोशानुसार उत्तम गति किंवा सहाय असलेले), गीतेने असंगशस्त्राने छेदण्यास सांगितलेल्या देहरूपी वृक्षाच्या (छेदनार्थी ओव्रूः धातूपासून वृक्ष) आश्रयाने राहणारे, कर्मफलांचा भोग भोगणारा जीव आणि साक्षित्वाने पाहणारा ईश्वर ज्याचे अंश आहेत.१०४. असा जो तो तूं परमात्मा; अचेतन अशा क्षर अशा पदार्थांचा चेतन आणि अक्षर नियंता असल्याने त्यांहून विलक्षण आणि म्हणूनच *'स वा अयमामात्मा', 'सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्यादिपतिः', 'सर्वमिदं प्रशास्ति'* इत्यादि श्रुत्यनुसार पुरुषोत्तम; वेदांनी प्रतिपादित, अव्यय आणि अनंत ईश्वर, त्रैलोक्य व्यापून त्याचे पालन करतोस. तुझ्या पदद्वयांना सतत वंदन असो.१०५.

**जानुपूर्वकजङ्घश्च विशालजघनस्थलः । पृथुश्रोणिश्च काकुत्स्थश्चारुनाभिर्दलोदरः ।।१०७।।**
**अररोरा मांसलांसो युगव्यायतबाहुकः । सुचिह्नचिह्नितकरः कम्बुकण्ठः स्मिताननः ।।१०८।।**
**स्नैग्ध्यधावल्ययुक्ताक्षश्चलत्-पिङ्गजटाधरः । चन्द्रकान्तिः प्रभुः कृष्ण-भ्रूरःश्मश्रुकनीनिकः ।।१०९।।**
**भावशुद्धद्विजाकीर्ण-स्वास्याब्जोऽभीवरप्रदः । दत्तात्रेयः स भगवान्सदा वसतु मे हृदि ।।११०।।**

जानु+पूर्व+जङ्घः च, विशाल+जघन+स्थलः, पृथु+श्रोणिः, च काकु+त्स्थः, चारु+नाभिः, दल+उदरः,।१०७। अरर+उरः मांसल+अंसः, युग+व्यायत+बाहुकः, सु+चिह्न+चिह्नित+करः, कम्बु+कण्ठः, स्मित+आननः,।१०८। स्नैग्ध्य+धावल्य+युक्त+अक्षः, चलत्+पिङ्ग+जटा+धरः, चन्द्र+कान्तिः, कृष्ण+भ्रू+उर+ श्मश्रु+कनीनिकः।१०९। भाव+शुद्ध+द्विज+आकीर्ण+सु+आस्य+अब्जः, अभी+वर+प्रदः, सः भगवान् दत्तात्रेयः प्रभुः सदा मे हृदि वसतु।११०।

**ध्यान -** (हे पायापासून आरंभ करून मुखापर्यंत केले आहे. प्रत्यक्ष पाहून केलेले हे वर्णन आहे. हे ध्यान दिगंबर असून ह्यांत कोणत्याही वस्त्र, आयुध किंवा आभरणांचा उल्लेख नाही. हे ध्यान द्विभुज आहे.) वज्र, अंकुश, ध्वजा आणि कमल या चिह्नांनी युक्त, लाल कमळाच्या रंगाचे तळवे असलेले, कांसवाच्या पाठीसारखे फुगीर वरचा भाग असलेले आणि टांचा झांकलेले ज्याचे पाय आहेत, मांडीच्या वरच्या भागावर एक पाय गंमतीने ठेवलेला आहे; प्रशस्त बैठक असलेला, दिगंबर, सुंदर नाभीसह पातळ पोट असलेला, कपाटासारखी रुंद छाती असलेला, मांसल बाहूंचा, विशाल बाहुद्वयांनी युक्त, ज्याचे हात शुभचिह्नांनी मंडित आहेत, ज्याचा गळा शंखासारखा तीन वलयांनी युक्त आहे, चेहऱ्यावर मधुर स्मित विलसत आहे, ज्याचे डोळे स्निग्ध आणि पांढरे आहेत, (कपाळावर) पिंगट जटा रुळत आहे, चंद्रासारख्या मनोहर कांतीचा, ज्याच्या भिंवया, छाती, दाढीमिशा आणि बुबुळे काळीं आहेत, स्वभावतः निर्मल अशा दंतपंक्तीने ज्याचे मुखकमल शोभत आहे असा आपल्या दोन हातांनी अभय आणि वर मुद्रा दर्शविणारा तो भगवान दत्तप्रभू सदैव माझ्या हृदयांत वास करो. श्रीदत्तात्रयवज्रकवचांत जवळजवळ हेच ध्यान आहे.१०६-११०.

**कलौ द्विराविरासीत्स दीनान्त्रातुं जनान्कलौ । सद्धर्मगुप्त्यै श्रीपाद-नरहर्यभिधानतः ।।१११।।**
**उड्डीयन्ते यथाशक्ति यथोच्चावचपक्षिणः । अनन्तेऽनन्तलीलां तन्न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।११२।।**

**।। इति श्रीगुरुचरिते श्रीगुरुस्तुतिः ।।**

सः कलौ दीनान् जनान् त्रातुं श्रीपाद+नरहरि+अभिधानतः कलौ द्विः आविरासीत्। यथा उच्च+अवच+पक्षिणः अनन्ते यथा+शक्ति उड्डीयन्ते तत् न्यायात् अनन्त+लीलां यथा+मति वक्ष्ये।

कलिकाळांतील दीन जनांचे रक्षण करण्यासाठी, तो श्रीपाद आणि नरहरी या नांवांनी साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी कलियुगांत दोन वेळां अवतरला.१११. असीम गगनांत लहान-मोठे पक्षी जसे आपापल्या कुवतीने भरारी घेतात त्याप्रमाणे मी त्या भगवंताच्या अनंत लीला माझ्या मतीनुसार सांगत आहे.११२.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील श्रीगुरुस्तुति इथे पूर्ण झाली. ती श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)**

**ज्ञानयोगः ।**

**प्रथमोऽध्यायः ।**

**नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः । यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ।।१।।**

यत्+अज्ञानात् जगत् रज्जु+अहिवत् उदेति, यत्+तत्त्वं ज्ञानां मीलति तं चित्+आनंद+सत् गुरुं नौमि ।

आतां चरित्राला सुरुवात करतात. ॐ ***रचतो श्रीगुरुदत्तप्रेरणेने श्रीगुरुचरितार्थबोधिनी । पूर्वाचार्यमतानुसारी टीका पहावी निर्मत्सर सर्वांनी ।*** या भूलोकीं ही खरोखर विचित्र, अतिगंभीर आणि दुस्तर अशी माया आहे, जिच्यामुळे हे सर्व जीव परमार्थतः परमार्थरूप असूनही तसा बोध करूनही 'मी परमात्मा आहे' असे उमजत नाहीत. उलट घटादि जड पदार्थांप्रमाणे दिसणाऱ्या अनात्म अशा देह, इंद्रिय आदींच्या संघाताला आपले स्वरूप मानून 'मी ब्राह्मण, अमक्याचा पुत्र' इत्यादि कल्पना (कुणी) न सांगतांही करून घेतात. खरोखर परमात्म्याच्या मायेने भुललेले बहुतेक सर्वही लोक अशा भ्रमांत पडलेले असतात. ह्या भ्रमाच्या परिहारासाठीच मातापित्यांच्या शतपट श्रेष्ठ अशा श्रुतीमाउलीने (वेदरूपी मातेने) आणि परमकारुणिक भाष्यकार पूज्यपाद आचार्यांनी निरनिराळ्या प्रकारे समजावूनही, व्याधीमुळे गोडीसाठी कडुलिंबच सेवण्यास प्रवृत्त होणाऱ्या बालकासारखे, ज्यांचे चित्त विषयाकडे ओढले जाते अशा संसारी जीवांना तो बोध रुचत नाही. त्यासाठी खडीसाखरेसारखा सगुण ब्रह्माच्या प्रसादाच्या फलाद्वारे, त्या संसारी जीवांना आदरपूर्वक परमतत्त्वाकडे प्रवृत्त करण्यासाठी श्रीदत्तप्रभूंच्या प्रेरणेने आत्रेयगोत्री वासुदेव नांवाचा कोणी एक ब्राह्मण, वेदांचे सार ज्यांत आले आहे असा श्रीगुरुचरितम् ग्रंथ रचण्यासाठी, 'काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून, प्रारब्ध भोगूनच संपवून आणि नित्यकर्मांच्या अनुष्ठानाने प्रत्यवाय टाळून अनायासेच स्वरूपाची प्राप्ति हाच मोक्ष', किंवा 'निरतिशय प्रीतीने

स्वर्गादि शब्दांनी निदर्शिलेल्या लोकांची कर्मानेच प्राप्ति होत असल्याने कर्मानेच मोक्ष' इत्यादी पूर्वपक्षांचे निराकरण करून शेवटी 'अविद्या, काम आणि कर्म यांची निवृत्ती करून स्वस्वरूपांत स्थिरावणे हाच मोक्ष; स्वतः आत्माच ब्रह्म असल्याने त्याचे अपरोक्ष ज्ञान झाल्याने अविद्याची निवृत्ती म्हणजेच मोक्ष' ह्या आचार्योक्त्यनुसार साक्षात् मोक्ष देणारे ज्ञानकांडच प्रधान असल्याने, भगवद्गुणांसहित ज्ञानकांडाचे निरूपण करण्यासाठी, तसेच त्याच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठी शिष्टाचारानुसार, अनुष्टुभ छंदांत मंगलाचरण केले आहे. **प्रथमाध्यायीं श्रीगुरु स्तविला श्रीगंधर्वपुरी । नामधारका स्वप्नदर्शने कृपा करी ।।१।।**

ज्याच्या अज्ञानाने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे हे जग प्रकटते आणि ज्ञानी लोकांना जे तत्त्व पुनः मिळते त्या चिदानंद सद्गुरूंना मी वंदन करतो.

त्या चैतन्य, आनंद आणि सत्यस्वरूपी गुरूंना नमन करतो. कोण हा गुरू? ह्या प्रपंचरूपी आभासाचे अधिष्ठान, जगताचे उपादान कारण, स्वतःच्या माया नांवाच्या अनिर्वाच्य शक्तीने युक्त, सत्य, ज्ञान, अनंत आदि लक्षणांनी युक्त, दत्त नामक जो सर्वेश्वर, त्याच्या अज्ञानाने - अविद्याजनित व्यामोहाच्या बंधनाने, दोरीवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणे हे नामरूपात्मक जगत् उगवते, प्रकट होते. या ठिकाणी रज्जुसर्पाच्या दृष्टांताद्वारे वेदसंमत विवर्तवादाचाच अंगीकार केला आहे; आरंभवाद किंवा परिणामवादांचा नाही. त्यावरून आत्मा हा अवयव, अवयवी पदार्थांत गणला जात नसल्याने, तसेच त्याचे द्रव्यत्वही मानतां येत नसल्याने, त्याचा जगताशी समवाय अथवा संयोग संबंध होऊं शकत नाही, तर केवळ अध्यासच जाणावा. अशा अज्ञानापासूनच प्रपंचाची उत्पत्ति सांगितली. अशा प्रकारचे हे जगत् ज्याला न जाणल्याने (ज्याच्या अज्ञानाने) प्रकटते आणि **यत्तत्त्वं** ज्या (अज्ञानामुळे पसरलेल्या) जगताचे तात्त्विक स्वरूप **ज्ञानां** विवर्ताच्या (आभासाच्या) अधिष्ठानभूत परब्रह्माला अभेदाने जाणणाऱ्यांना **पुनर्मीलति** परत लोप पावते. त्याला नमस्कार करतो असा संबंध आहे. दोरी आणि सर्प यांचा दृष्टांत देहलीदीप न्यायाने दोन्हीकडे लागूं आहे. लौकिक

अनुभवांत दोरीचा विवेक केल्यावर जशी 'हा सर्प आहे' ही बुद्धी दूर होते, तसेच ज्यांना सच्चिदानंदाचा विवेक होतो त्यांचा तद्विपरीत जगदाभास *'यतो वाचो निवर्तन्ते'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मानंदवल्ली २:४) ह्या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे तो मिथ्या असल्याने नाहीसा होतो. हेच असे सांगतां येईल कीं विवर्तावर अध्यासलेले जगत् अज्ञानाचा विलास असल्याने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे मिथ्या होण्याच्याच योग्यतेचे आहे.

इथे एक अशी शंका उपस्थित होऊं शकते की जगताच्या उत्पत्तीचे कारण ब्रह्मदेव (किंवा प्रधान) आहेत असे वेदांत सांगितले आहे. तर इथे परमेश्वरापासूनच जगताची उत्पत्ति प्रतिपादिली आहे. याचे समाधान असे आहे. 'जो ब्रह्मादेवाला आधी निर्माण करतो (*यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम्*)' हे वेदवाक्य (श्वेताश्वतर उ. ६:१८) आणि *'गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे'* हे गीतावचन ब्रह्मदेव परमेश्वराचा शिष्य असल्याचे प्रतिपादन करतात. तसेंच *'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्'* (श्वेताश्वतर उ. ४:१०) ह्या मंत्रानुसार माया ही परमेश्वराचीच शक्ती आहे आणि ती अचेतन आहे त्यामुळे परमेश्वरालाच जगदुत्पत्तीचे कारण मानावे लागेल.

**चित्** चैतन्यस्वभाव, जड नसलेला, स्वयंप्रकाश; निरतिशय, निरुपाधिक, नित्य आनंद सत्य, त्रिकालाबाधित असा हा गुरूच जगताच्या उत्पत्ति, स्थिति, लय यांचे कारण आहे; ब्रह्मा, प्रधान, अणू किंवा असत् हे नाहीत. शारीरकमीमांसेच्या दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत *'रचनानुपपत्तेच'* अशी सुरुवात करून आठ अधिकरणांत ह्या सर्व मतांतरवादांचे निराकरण केलेले आहे. ते तिथेच पहावे. त्याचप्रमाणे *'तस्माद्वा एतस्मादात्मान आकाशः संभूतः'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मवल्ली २.१), *'यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. भृगुवल्ली ३.१) हेच दर्शवितात.

इथे (**चिदानंदसद्** ह्या पदांत) संसर्ग वा विशिष्ट वाक्यार्थ न घेतां (श्रीमच्छंकराचार्यांनी) वाक्यवृत्तींत सांगितल्याप्रमाणे

(*संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र संमतः। अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषो मतः।।३८।।*) अखंडार्थ घ्यावा. गुरुशब्दाने दर्शविलेले *ब्रह्म चिदानंदसत्* ह्या शब्दांसहित अखंडैकरस जाणावेत. उदाहरणार्थ लोहितोष्णप्रकाशप्रदीप. लाल, उष्ण आणि प्रकाश हे दीपांत एकाच वेळी जाणवतात आणि त्यापासून अभिन्न असतात.

इथे जीवाचे संसारित्व आणि दुःखित्व हे नित्य आहे ह्या वादाच्या निरासासाठी पुनः शब्दाची योजना करून *'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'* (बृहदारण्यक उ. ४.४.६) ह्या वेदवाक्याचा अर्थ स्पष्ट केला आहे.

**ज्ञानाम्** हे अनेकवचन वापरून 'एकमुक्तौ सर्वमुक्तिप्रसंगः' ह्या पक्षाचे निरसन केले आहे. ज्ञ शब्दाने *'ज्ञोऽत एव'* (ब्रह्मसूत्र २.३.१८) ह्या अधिकरणन्यायाची पुष्टी केली आहे. ह्याने जीवाचे नित्यत्व, चिद्रूपत्व (ते अचिद्रूप - जड नाही) सुचविले आहे. कारण सुषुप्ति आदि अवस्थांतही तो साक्षित्वाने असतो. तर मग सुषुप्त्यादि अवस्थांत द्वैताची प्रतीती कां नसते? असे म्हणाल तर बृहदारण्यक उपनिषदांत (४.३.२२) 'यद्वै तन्न पश्यति' असे म्हटले आहे. किंवा *'यः सर्वज्ञः सर्ववित्'* (मुंडक उ. १.१.९) ह्या श्रुतीप्रमाणे **ज्ञ** शब्दाचा अर्थ ईश्वर असा करतां येईल. म्हणजेच ज्ञानी हा सर्वेश्वराहून वेगळा नाहीच. *'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति'* (मुंडक उ. ५.२.९) ह्या श्रुतीने आणि *'ज्ञानी त्वात्मैव मे मतः'* ह्या भगवद्वचनाने (भ.गीता ७.१८) ह्याचे समर्थन केले आहे.

हे शास्त्र आरंभणीय आहे की नाही असे विचाराल तर विषय आणि प्रयोजन असल्यामुळे *'अथातो ब्रह्मजिज्ञासा'* (ब्रह्मसूत्र १.१.१) या न्यायानुसार ते आरंभणीय आहे. सर्व अनर्थांचे मूळ असलेल्या प्रपंचाची निवृत्ती हे प्रयोजन आहे. तसेच ह्या प्रपंचरूपी विवर्ताचे अधिष्ठान जे ब्रह्म त्याचे ज्ञान हा विषय आहे. त्या(ब्रह्मज्ञाना)ची इच्छा करणारा साधनचतुष्टयसंपन्न ब्राह्मण हा अधिकारी आहे असे समजावे।।१।।

**भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया । विदास्यैक्यं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ।।२।।**

एकं सत् परं ब्रह्म धी+भेदात् अनेक+रूपया भाति। विदा अस्य ऐक्यं तत् सत्यं दत्त+संज्ञितम्।२।

एकच परब्रह्म असूनही बुद्धिवृत्तींच्या भेदांमुळे अनेकासारखे भासते. ह्याचे ज्ञानाने ऐक्य होते तेच दत्त नांवाचे सत्य होय. 'श्रेयांसि बहुविघ्नानि' ह्या उक्तीला अनुसरून *'एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः। एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत्।'* (त्रिपुरतापिनी उ. ५.१२), *'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'* (पैंगल १.१), *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०), *'नेह नानास्ति किंचन'* (बृहदारण्यक उ. ४.४.१९) ह्या वेदवाक्यांनी प्रतिपादिलेले ऐक्यात्म्य वस्तुनिर्देशात्मक (आणखी एका) मंगलाचरणाद्वारे सांगतात. *'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्'* (छांदोग्य उ. ६.२.१) ह्या श्रुतीने द्वैताचा निषेध करून प्रतिपादिलले **एकं** सजातीय आणि विजातीय भेदांनी रहित, **सत्** त्रिकालाबाधित देश, काल, वस्तु अशा कुठल्याही विभागणीच्या पलीकडील **परं ब्रह्म** परब्रह्म **धीभेदात्** अंतःकरणाच्या उपाधीमुळे, देव, मानव, पशु आदि अनेक रूपांनी **अनेकवत्** वि**भाति** भासते **तत्** ते खरे तर *'तत्त्वमसि'* (छांदोग्य उ. ६.८.७) ह्या उपनिषद्वाक्यानुसार एकच आहे.

**शंका -** सृष्टीच्या पूर्वी आपण म्हणतां तसे ते एकच असेलही. आतां स्थितीच्या काळांत सर्वांच्या अनुभवाच्या प्रत्यक्षादि प्रमाणानुसार सर्वांच्या प्रत्ययाला येणारे खाणे-पिणे इत्यादि व्यवहारांतले जगत् नामरूपात्मकच असून ते अनेकत्वानेच बनलेले आहे.

**समाधान -** भागत्यागलक्षणेच्या द्वारा **विदा** ज्ञानाने **अस्य** ह्या विद्यमान जगच्चालक व भासक सत्याचे **ऐक्यं** एकत्व *'अयमात्मा ब्रह्म'* (बृहदारण्यक उ. २.५.१९) ह्या श्रुतिवचनाप्रमाणे निर्बाध आहे.

**पर्यायी अर्थ -** किंवा असेही म्हणतां येईल की पहिल्या श्लोकाने तत्पदार्थ सांगितला आहे व ह्या दुसऱ्या श्लोकाने त्वंपदार्थ! **एकं** साक्षित्वाने जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनही अवस्थांत विद्यमान असणारे, **सत्** प्रत्यग्रूप, **धीभेदात्** (धी शब्दाचा इंद्रिय असा अर्थ करून) भिन्न भिन्न श्रोत्रादि इंद्रियांच्या शब्दादि विषयांच्या उपाधींमुळे **अनेकवत्** विखुरल्यासारखे भासते. प्रत्यक् रूप स्वभावतः शुद्ध असूनही मलिन उपाधींमुळे नाना रूपांनी नटल्यासारखे दिसते. जेव्हां उपाधिविशिष्ट गुणधर्मांना सोडून त्या त्या उपाधींच्या लक्ष्याचा शाखाचंद्रन्यायाने विवेक केला असतां उपाधिजनित अपकर्षाचा निरास होऊन प्रकृष्ट (आत्मरूपच) उरते. तेच चैतन्य श्रोत्रादि उपाधींत प्रवेशून ती ती कार्ये करतांना दिसले तरी उपाधिविशिष्ट चैतन्य गौण असून प्रत्यक् चैतन्यच मुख्य आहे. हाच विचार बृहदारण्यक उपनिषदांत (१.४.७) *'स एव(ष) देहे प्रविष्टः'* (तोच हा (जीव) देहांत प्रवेश करून) अशी सुरुवात करून *'तन्न पश्यांत्यकृत्स्नो हि स प्राणन्नेव हि प्राणनामको भवति वदन् वाक् पश्यंचक्षुः, शृण्वन् श्रोत्रं मन्वानो मन एतानि कर्मनामधेयानि भवन्ति'* असा विशद केला आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनी याचा असा अर्थ केला आहे. देहांत नखशिखांत प्रवेश करून ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या उपाधींचा आश्रय केलेल्या त्या आत्म्याला विवेकी पुरुष आपला आत्मा मानत नाहीत. कारण तो उपाधिविशिष्ट आत्मा एकसंध अविच्छिन्न नसतो. मग त्याला मुख्यात्मत्व कुठून येणार? प्राणचालनाने श्वासोच्छ्वास करतांना प्राणोपाधीच्या योगे तो प्राणनामक होतो. वाचा आदि उपाधींशी त्याचा संबंध तेव्हां नसतो. त्याचप्रमाणे एका एका उपाधीशी संलग्न असतांना तो इतरत्र जात नाही. जसे वाचेशी संलग्न असतांना तो चक्षु वा इतर उपाधीपासून दूर असतो. असा भिन्न भिन्न उपाधीच्या आश्रयाने तो विच्छिन्न भासतो. तर त्याला एकसंध वा अखंड कसे मानतां येईल? अशी शंका घेतल्यास त्याचे उत्तर असे आहे - शब्दादि उपाधिविशिष्ट भावांचा त्याग करून एकरूप **विदा** बुद्धीने **अस्य** ह्या प्रत्यगात्म्याचे **ऐक्यं** एकत्व कळते. बृहदारण्यकांतही म्हटले आहे *'आत्मानमेवोपासीत तर्ह्येके एकीभवन्ति'* (१.४.८). **तत्** ते एकत्वाने निचित केलेले **सत्यं** पूर्ण, निर्बाध, तत्त्वंपदार्थांच्या सामरस्याने अखंडैकरस **दत्तसंज्ञित** दत्त नामक पूर्ण ब्रह्म होय.

सूर्यपक्षी ह्या श्लोकाचा असा अर्थ लावतां येईल. *'एकैव वा महानात्मा देवता। स सूर्य इत्याचक्षते'* (कात्यायनकृत ऋग्वेदसर्वानुक्रमणिकांतर्गत द्वादशकांडी परिभाषा २.१४.१५) इत्यादींनी सांगितलेले सूर्यात्मक तेज *'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च'* (ऋग्वेद १.११५.१) याप्रमाणे **एकं सत्** एक असूनही *'इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुः'* (ऋग्वेद १.१६४.४६) इत्यादि श्रुतिप्रणीत देवतारूप **धीभेदात्** बुद्धीने *'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति'* (ऋग्वेद १.१६४.४६) या वेदवाक्यानुसार **अनेकवत् भाति** अनेक देवतारूप भासतो.

विष्णु, दत्तात्रेय, देवी, शिव यांच्या पक्षी **एकं सद्** त्या त्या देवतांचे एकच रूप वरच्या, खालच्या, उजव्या, डाव्या इत्यादि हातांनी धारण केल्या आयुधांच्या **धीभेदात्** निरनिराळ्या क्रमांच्या विचाराने **अनेकवत्** विभिन्न व्यूहांसारखा (केशव, नारायणादि) भासतो. त्यानुसार चतुर्भुज विष्णूचे २४, षड्भुज श्रीदत्तात्रेयाचे ७२०, अष्टभुजा देवीचे ४०३२० तर दशभुज शिवाचे ३५२८८०० भेद जाणावेत।।२।।

**बोद्धुं भूत्वात्रिपुत्रः स्वपदरसपरान्दिव्ययोगेन बालान् ।**
**दत्ताख्यः कार्तवीर्यं यदुमपि च समान्स्वाश्रितानुद्दधार ।**
**भूयोऽन्यान् श्रीपदाख्यः पुनरपि नृहरिः संज्ञया स्वीयभक्तान्।**
**कृष्णाभीमातटस्थो जयति परगुरुः स्मर्तृगाम्येष दत्तः ।।३।।**

स्व+पद+रस+परान् कार्तवीर्यं यदुं अपि च समान् स्व+आश्रितान् बालान् दिव्ययोगेन बोद्धुं दत्त+आख्यः अत्रिपुत्रः भूत्वा भूयः श्रीपद+आख्यः पुनः अपि नृहरिः स्वीय+भक्तान् उद्दधार। एष कृष्णा+भीमा+तट+स्थः पर+गुरुः स्मर्तृगामी दत्तः जयति।३।

आपल्या पदाच्या रसांत निमग्न असणाऱ्या, कार्तवीर्य आण यदु यांसारख्या आपल्याला शरण आलेल्या बालकांचा अत्रि मुनींच्या पोटी दत्त नांवाने अवतरून उद्धार केला. पुढेही श्रीपाद व नंतर नरहरि नाम धारण करून आपल्या इतरही भक्तांचा उद्धार करून तो परगुरु, स्मर्तृगामी दत्त कृष्णा आणि भीमा यांच्या तीरांवर विराजत आहे. हे (उपरिनिर्दिष्ट) वर्णन मुनिपुत्र दत्तात्रेयाला कसे लागूं पडेल ह्या शंकेच्या अपेक्षेने सांगतात. आपल्या षड्गुण ऐश्वर्यासह, स्वतःच्या शुद्ध चिदानंदैक स्वरूपानेच लोकशिक्षणासाठी - स्वात्मतत्त्वाच्या **बोद्धुं** उपदेशासाठी - उपासना, योग आदि उपायांनी प्राप्त होणाऱ्या स्वात्मतत्त्वाच्या ज्ञानासाठी *'अधीहि भगवो ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. ३.१.१) ह्या उक्तीप्रमाणे तसेच *'आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च'* या ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) **अत्रिपुत्रो भूत्वा** अत्रिमुनींच्या घरी अवतरून **स्वस्य पदं** पद्यते म्हणजे योग्यांना प्राप्त होते ते पद; देश-काल-वस्तु यांनी अपरिच्छिन्न असा जो चिन्मय आनंदरूपी रस, *'रसो वै सः'*, *'रसँ ह्येवायं लब्ध्वानन्दी भवती।'* (तैत्तिरीय उ. २.७.१) ह्या श्रुतींनी वर्णिलेला स्वरूपानंद; त्यांत निमग्न असलेल्या **बालान्** बालकाप्रमाणे मानावमानचिंतारहित निरागस वृत्ती धारण केलेल्या; सगुणपक्षी आपल्या चरणाच्या भजनाच्या आनंदांत मग्न असलेल्या व बालवत् विषयांत रमणाऱ्या, कृतवीर्याचा मुलगा **कार्तवीर्य** तसेच ययातिपुत्र **यदु** आणि **समान्** त्यांच्यासारख्या इतर सर्व **स्वाश्रितान्** आपल्या प्रह्लादादि भक्तांचा **दिव्ययोगेन** दिव्य म्हणजे ज्ञानात्मक उपनिषत्प्रणीत

योग म्हणजे उपाय. ह्या योगाचा अवलंब करणाऱ्यांचे गर्भावास, जन्म, जरा इत्यादी क्षीण होतात किंवा नाश पावतात आणि ते ब्रह्माकडे प्रगत होतात. ह्या योगाचा उगम उपनिषदांत असल्याने व वेदांनी ब्रह्माला औपनिषद पुरुष म्हटले असल्याने, (*'तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि।'* बृहदारण्यक उ. ३:९:२६) तो दिव्य योग आहे. उपनिषदांचे शाब्द ज्ञान परोक्ष असले तरीही त्याच्या श्रवण-मननांनी संशयभावना, असंभावना आणि विपरीतभावना दूर होऊन तेच अपरोक्ष ज्ञानांत परिणत होते. दिव्य योग या शब्दाचा अर्थ, *'आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिं। ध्याननिर्मथनाभ्यासात् देवं पश्येन्निगूढवत्।।'* (ध्यानबिंदूपनिषत् २२) (आत्म्याची अरणी आणि प्रणवाचा मंथा करून ध्यानरूपी मंथनाच्या अभ्यासाने अंतरांत लपलेला देव (प्रकट करून) पहावा.) ह्या वचनानुसार ध्यानयोग असाही करतां येईल. *'नान्यः पंथा विद्यतेऽयनाय'* (आत्मप्राप्तीसाठी दुसरा मार्ग नाही) (श्वेताश्वतर उ. ३:८, ६:१५) ह्या मंत्रानुसार या अष्टांगयोगाने आणि ज्ञानयोगाने **उद्दधार** *'पादोऽस्य विश्वा भूतानि'* (ऋग्वेद संहिता १०:९०:३) ह्या मंत्रांत प्रतिपादलेल्या मायाप्रपंचरूपी पायाच्या वर त्याच मंत्रांत पुढे सांगितलेल्या *'त्रिपादस्यामृतं दिवि'* तेजोमय, स्वयंप्रकाश अशा अमृतस्वरूप परब्रह्मांत अभेदाने ठेवले. म्हणजेच उपरिनिर्दिष्ट स्वभक्तांना आपल्यासारखेच केले. जरी निरंश अनंत अशा ब्रह्माच्या ठायीं अंशाची कल्पनाही करतां येत नाही तरीही *'निरंशेऽप्यंशमारोप्य कृत्स्नेंऽशे वेति पृच्छतः। तद्भाषयोत्तरं ब्रूते श्रुतिः श्रौतहितैषिणी।।'* (अंशरहित ब्रह्मावर अंशाची कल्पना करून त्याच्याविषयी पूर्ण कीं अंश असे विचारणाऱ्याला, ऐकणाऱ्याच्या हितासाठीच श्रुतिमाउली त्याच्याच भाषेंत उत्तर देते) (पंचदशी २:५८) ह्या वचनानुसार समोरच्याला त्याच्याच भाषेच समजावण्यासाठी तसा शब्दप्रयोग केला आहे. **भूयः** पुन्हां कांही काळाने श्रीपाद श्रीवल्लभ नांवाने **अन्यान्** आणखी भक्तांचाही उद्धार केला. कलियुगांतच **पुनरपि** पुन्हा एकदा नरहरि नांव घेऊन सिद्ध सरस्वती आदि **स्वीयभक्तान्** आपल्या भक्तांचा उद्धार केला. अशा रीतीने भगवंताची कृपाच भक्तांच्या मोक्षाला कारण होते. *'एष एव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो उन्निनीषते एष*

**योऽजोऽक्रियोऽस्पृहोऽप्येको बहुः स्यामिति तृष्णया । प्रकृत्या गुणमय्येदं ततानेशो जगत्प्रभुः ।।४।।**

यः अजः अक्रियः अस्पृहः प्रभुः अपि एकः बहुः स्याम इति तृष्णया गुणमय्या प्रकृत्या जगत् ततान।४।

*एवासाधुकारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो निनीषते।'* (हाच परमात्मा यमलोकांपासून वर काढण्यासाठी सत्कर्माची प्रेरणा देतो आणि हाच यमलोकांत ढकलण्यासाठी दुष्कर्माकडे प्रवृत्त करतो.) (कौषीतकी ब्राह्मण उ. ३:८) ही वेदोक्ति हेच सांगते. ह्यांत परमेश्वराला वैषम्य (पक्षपात) आणि नैर्घृण्य (दुष्टपणा) हे दोष किंवा त्याचे पापपुण्य लागत नाहीत. कारण तो ज्याला त्याला आपापल्या कर्मानुसार फळे देत असतो. कृष्णाकांठी नरसोबावाडी इत्यादि ठिकाणी तसेच भीमातीरी गाणगापूर येथे राहणारा दलादनमुनींच्या वचनानुसार **स्मर्तृगामी** 'स्मरतां दर्शन देणारा' **एषः** हा स्वयंप्रकाश अपरोक्ष **परगुरुः** पर म्हणजे ब्रह्मदेवादिक, त्यांचाही पतंजलींच्या वचनानुसार (*स एव पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्*)(काळाने न भंगणारा तोच प्राचीनांचाही गुरू आहे) (योगसूत्र १:२६) गुरु, **दत्तः** दत्तप्रभू **जयति** स्वभक्तांचा उद्धार हाच जय मिळवीत आहे. ३.

**यः** जो आधीच्या लोकांत वर्णन केला तो **अजः** जन्म, वृद्धी, परिणाम, अस्तित्व, क्षय आणि नाश या सहा विकारांच्या पलीकडला (*'महानज आत्मा'* बृ.उ. ४:४:२४); **अक्रियः** क्रिया म्हणजेच कर्माच्या अतीत असलेला. हे पातंजल योगसूत्रातील क्लेश, कर्म, विपाक, आशय ह्यांचे उपलक्षण आहे. (*'क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः'* योगसूत्र १:२४); **अस्पृहः** वेदांत वर्णिल्याप्रमाणे आप्तकाम (बृ.उ. ४:४:६) असल्याने निरिच्छ; **एकः** ऐतरेय उपनिषदांत (१:१:१) सांगितल्याप्रमाणे (*आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्*) अद्वितीय; अशा ईश्वरापासून जगत् निर्माण होणे असंभव असल्याने वेदवचनांनी मायासहित उपादानाच्या विधानांना (*'मायां तु प्रकृतिं विद्यात्'* श्वे.उ. ४:१०), (*'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते'* ऋ.सं. ६४:७:१८) अनुसरून ईश्वराने मायेचा अंगीकार केला. ह्याचा अर्थ माया ही ईश्वरापासून भिन्न आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. कारण ती ईश्वराचीच शक्ती असून तिला वेगळे वस्तुत्व नाही.

त्यामुळे तिची वेगळी गणना करतां येत नाही. कांही कार्यासाठी मालकाने आपल्या चाकराला दिलेले धन जसे त्याचे होत नाही किंवा पाण्यात पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला शहाणा माणूस दुसरा चंद्र म्हणत नाही त्याप्रमाणे! हेच व्यास महर्षींनी *'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टांतानुपरोधात्'* (१:४:२३) या सूत्राद्वारे प्रतिपादले आहे. हा जो परमेश्वर तो केवळ निमित्तकारणच नसून तोच प्रकृतिरूप उपादानही आहे. वेदांत एका ब्रह्माचे विज्ञान झाले की सर्वांचे विज्ञान होते असे विधान (सर्वविज्ञानप्रतिज्ञा) आहे. (*'येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातम्'*, छां.उ. ६:१:३). त्याला जोडूनच मातीच्या गोळ्याचा दृष्टांत आहे. एका मातीच्या वस्तूचे ज्ञान झाले की सर्व मृन्मय वस्तूंना जाणल्यासारखे आहे. त्या वस्तूंना विविध आकारांनुसार निरनिराळी नांवे दिली तरी त्या सर्वांचे स्वरूप मातीचेच आहे. (*'यथा सोम्येकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद् वाचारंभणं विकारो नामधेयम्'*, छां.उ. ६:१:४) वरील प्रतिज्ञेनुसार आणि दृष्टांताच्या अनुरोधाने प्रकृति ईश्वरापासून अभिन्न आहे असे प्रतिपादन व्यासांनी ह्या सूत्रांत केले आहे. **गुणमय्या प्रकृत्या** अशा ह्या त्रिगुणात्मक प्रकृतीद्वारा **ईश** सर्वज्ञ, स्वतंत्र, भगवान प्रभु, **बहु स्याम्** अनेक रूपें धारण करावीत **तृष्णया** अशा इच्छारूपी संकल्पाने **जगत् ततान** विश्वाचा पसारा मांडला. ईश्वर *'सत्यकाम सत्यसंकल्प'* (छां.उ. ८:१:५) असल्याने त्याचा संकल्प केवळ मनोराज्य नसल्याने प्रत्यक्षात उतरतो. ह्यासाठी ईश्वराला फारसे प्रयास पडले असे नाही. *'स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीप्रमाणे तपोरूपी साधनाची अपेक्षा असली तरी *'बहुः स्याम्'* ह्या संकल्पांत अंतर्भूत असलेले, निर्माण करायच्या जगताचे पर्यालोचन (conception) हेच ते तप होय. कृच्छ्रादि नव्हे. *'यस्य ज्ञानमयं तपः'* (मुं.उ. १:१:३) असे श्रुतिवचनच आहे. **जगत् ततान** असे म्हटले आहे ते घटादिकांप्रमाणे जड नव्हे. तर पुढच्याच लोकांत सांगितल्याप्रमाणे देह, बुद्धी, इंद्रिये यांच्यापासून बनलेले आहे. कुंभाराने घडवलेल्या, घडा, सुरई इत्यादि मातीच्या वस्तूंपासून वेगळे, ज्याचे निमित्त आणि उपादान कारण एकच (ईश्वर) आहे. जीवांच्या कर्मादिकांनुसार देश, काल, नाना रूपे, पूर्वकल्पासारखेच सर्वही प्राणिमात्रांना अनुभवाला येणारे असे हे जगत् आहे. त्याच्या अंतरांत, पाहणारा, ऐकणारा, विचार करणारा, जाणणारा इत्यादि विशेषणांनी युक्त अशा स्वरूपांत *'तत्स्रष्ट्वा*

**आब्रह्मस्तम्बपर्यन्तं देहबुद्धीन्द्रियात्मकम् । सृष्टं चराचरं तत्र संवित्पात्रं नरोत्तमः ।।५।।**

आ+ब्रह्म+स्तंब+पर्यन्तं देह+बुद्धि+इन्द्रिय+आत्मकं चर+अचरं सृष्टम्। तत्र नर+उत्तमः संवित्+पात्रम्।५।

*तदेवानुप्राविशत्'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीनुसार अनुप्रवेश करून त्याचा विस्तार केला. हा अनुप्रवेश घरांत प्रवेशणारा देवदत्त अथवा जलांत प्रतिबिंबित झालेला सूर्य यांसारखा नसून द्रष्टा इत्यादि लक्षणांनी युक्त जीवरूपाने होणारा आहे.४.

ब्रह्मदेवापासून स्थावरांपर्यंत देह, बुद्धी, इंद्रिये धारण करणारे जे चराचर (जीवमात्र) ईश्वराने निर्मिले आहेत त्या सर्वांत श्रेष्ठ मानवच (ईश्वरी) ज्ञानाचा अधिकारी आहे.

*'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे'* ह्या ऋचेनुसार (१०:१२१:१) व *'स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते'* ह्या पुराणवाक्यानुसार (कूर्मपुराण पूर्वभाग ४:३८) ब्रह्मदेव हेच आद्य व श्रेष्ठ शरीरधारी असल्याने त्यांच्यापासून स्थावरांपर्यंत देहबुद्धीन्द्रयात्मक जगताची उत्पत्ति केली. त्या सर्वांत ज्ञानयोग्य असे केवळ मानवशरीरच आहे. ऐतरेय उपनिषदांत सांगितले आहे की ईश्वराने अचेतन लोकांच्या रक्षणासाठी देवांची निर्मिती केली. त्यांच्या प्रार्थनेनुसार भगवंताने गाय इत्यादि पशू (अस्तित्वांत) आणले. त्या सर्वांत 'हा आम्हांला पुरेसा नाही' (*'न वै नोऽयमलम्'*, ऐ.उ. १:२:२) असे म्हणणाऱ्या देवतांना जेव्हां शेवटी विवेकसंपन्न माणूस (अस्तित्वांत) आणला तेव्हां 'हे फार छान केले' (*'सुकृतं बत'*, ऐ.उ. १:२:३) असे त्या म्हणाल्या. ऐतरेय आरण्यकांतही मनुष्याचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. 'मानवांतच आत्म्याचा विकास होतो. तोच प्रज्ञानसंपन्न होतो. ज्ञानाची अभिव्यक्ति करतो, ज्ञान पाहतो, उद्यांची (भविष्याची जाणीव) त्यालाच आहे; इहपरलौकिकांना जाणून मर्त्य असूनही अमृतत्वाची इच्छा करतो. अर्थातच तहान, भूक इत्यादि शारीरिक प्रवृत्ती हीच ज्ञानाची परिसीमा असणाऱ्या इतर पशूंपेक्षा तो संपन्नतम आहे' (ऐ. आरण्यक २:३:२). ज्ञानकर्मांची शक्ती व जिज्ञासा असणारा व त्यांच्या तत्त्वाला जाणू शकणारा पुरुषच साधक, विद्वान् व समर्थ असल्याने त्यालाच ज्ञान व कर्म यांचा

अधिकार आहे.

**विषय -** 'शास्त्रयोनित्वात्' (शास्त्राच्या उगमावरून) ब्रह्मसूत्राप्रमाणे (१:१:३) अद्वितीय आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचा एकमेव उगम असल्याने उपनिषद हा विषय होय.

**अधिकारी -** त्याचा अधिकारी ब्राह्मण होय. कारण तोच विवेकाने 'हे मना! तू का असा पिशाचासारखा सूसाट धावत आहेस? स्वतःसाठी म्हणावे तर तू जड असल्याने प्रयोजन होऊं शकत नाहीस. विषयांसाठी म्हणावे तर ते क्षणभंगुर इत्यादि दोषांनी ग्रस्त असल्याने तुझ्या धांवपळीचे प्रयोजन असूं शकत नाहीत. चैतन्याच्या प्राप्तीची जर तुझी इच्छा असेल तर ते असंग, परमानंदस्वरूप असल्याने ते तुझ्या धांवाधांवीने नाही तर तुझ्या (मनाच्या) नियंत्रणाने, विषयकल्पनांचा त्याग करून 'मी ब्रह्म आहे' ह्या एकाच विषयशून्य वृत्तीने ब्रह्मभावाची अभिव्यक्ती करणाऱ्या महावाक्यांच्या चिंतनांतूनच उगवणाऱ्या बुद्धिवृत्तीद्वाराच जाणतां येईल.'

इथे **नरोत्तम** या शब्दाने बुद्धीने परमार्थप्राप्तीचा निश्चय ज्याने केला आहे असा ब्राह्मण असा घ्यावा. गरुडपुराणांत म्हटले आहेच 'सर्व जीवांमध्ये प्राणी श्रेष्ठ आहेत, त्यांतही बुद्धिजीवी, बुद्धिमानांत माणूस, माणसांतही ब्राह्मण, ब्राह्मणांत विद्वान् आणि विद्वानांत कृतबुद्धी श्रेष्ठ जाणावेत.' ('भूतानां प्राणिनः श्रेष्ठास्तेभ्यो बुद्ध्युपजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणाः स्मृताः। ब्राह्मणेषु च विद्वांसो। विद्वत्सु कृतबुद्धयः।।' गरुड पुराण, प्रेतखंड, धर्मकांड, १२:११).५.

**इन्द्रियार्थे स्थितौ रागद्वेषौ येन जितौ स तु । दैवीसंपल्लभेन्मोक्षं तदर्थं संभवत्यजः ।।६।।**

इन्द्रिय+अर्थे स्थितौ राग+द्वेषौ येन जितौ दैवी+संपत् सः तु मोक्षं लभेत्। तत्+अर्थं अजः संभवति।६।

विषयांच्या ठिकाणी असलेले आकर्षण आणि तिरस्कार जिंकून जो दैवी संपत्ती मिळवतो त्यालाच मोक्षाचा लाभ होतो. त्याच्यासाठीच जन्म-मरणादि विकार नसलेला परमात्मा (या मनुष्यलोकांत) जन्म घेतो. 'स्वयंभू परमात्म्याने इंद्रियरूपी छिद्रे बहिर्मुख छेदली असल्याने (जीव) अंतरात्म्याला न पाहतां बाहेर पाहतो.' (कठ उ. २:१:१), 'ज्याचे श्रवणसुद्धा फार लोकांना लाभत नाही, श्रवण करणाऱ्यांतही बहुतेकांना जो समजत नाही' (कठ उ. १:२:७), 'वस्तऱ्याच्या धारेवर चालणे जसे कठीण तसा हा (परमात्मज्ञानाचा) मार्ग दुर्गम आहे' (कठ उ. १:३:१४) असे जर उपनिषदांतच सांगितले आहे तर त्या ज्ञानाची योग्यता मनुष्याला येते असे कसे म्हणतां येईल? अशी शंका घेतल्यास 'कुणी धीर पुरुष अमृतत्वाच्या इच्छेने आपल्या इंद्रियांचा संयम करून प्रत्यगात्म्याचे दर्शन घेतो' (कठ उ. २:१:१), 'शहाण्याने वाचेचा मनांत संयम करावा आणि त्याचा (मनाचा) निग्रह आत्मज्ञानासाठी करावा' (कठ उ. १:३:१३), 'जो केवळ आत्म्यालाच वाहून घेतो त्यालाच हा आत्मा आपल्या स्वरूपाची ओळख करून देतो' (कठ उ. १:२:२३) इत्यादि श्रुतींच्या प्रतिपादनावरून ही शंका निराधार आहे हे स्पष्ट करण्यासाठी ह्या श्लोकांत म्हणतात. सर्वच इंद्रियांच्या विषयांच्या ठिकाणी 'सुखाशी संलग्न असणारा राग' व 'दुःखाशी निगडित असणारा द्वेष' या पातंजल (२:७) उक्तीनुसार पूर्वजन्मातील संस्कारांनी घडलेल्या जीवाच्या प्रकृतींतील अनुकूल व प्रतिकूल प्रवृत्ती **येन** ज्याने भगवंताच्या ध्यानादिकांनी **जितौ** जिंकल्या आहेत **स तु** त्या रागद्वेषरहित साधकाला **दैवीसंपत्** दैवी संपदा प्राप्त होते व त्याचे अज्ञानकल्पित स्थूल देहापासून अहंकारापर्यंतचे सर्व बंध तुटून **मोक्षं लभेत्** मोक्ष मिळतो. श्रीमद्भगवद्गीतेतील *'इन्द्रियस्येन्द्रियार्थे..'* (३:३४) व 'दैवी संपद्विमोक्षाय' (१६:५) ह्या श्लोकांत हेच सांगितले आहे. गीतेच्या १६व्या अध्यायांत दैवी संपदेचे निरूपण आहे. **तदर्थं** त्या मोक्षाला योग्य अशा आपल्या भक्तासाठीच **अजः** अजन्मासुद्धा भगवंत **अवतरति** भूतलावर अवतरतो.६.

**गाढं प्रियोऽस्य भगवांस्तस्यायमपि तादृशः । गुप्त्या अवतरत्यस्य लीलाधाम्नाप्यजोऽव्ययः ॥७॥**
**युगे युगेऽवतीर्यापि कार्यान्ते व्यसृजत्तनूः । एवं ब्राह्मेऽह्नि संप्राप्तो युगाष्टाविंशपर्ययः ॥८॥**

अस्य भगवान् गाढं प्रियः, अयं अपि तादृशः। अस्य गुप्त्या अजः अव्ययः लीला+धाम्ना अवतरति।७। युगे युगे अवतीर्य अपि कार्य+अन्ते तनूः व्यसृजत्। एवं ब्राह्मे अह्नि युग+अष्ट+विंश+पर्ययः संप्राप्तः।८।

गीतावचनानुसार (७:१७) ह्या(भक्ता)चे भगवंतावर प्रगाढ प्रेम असते तसेच त्या(भगवंता)चेही तसेच ह्याच्यावर प्रेम असते. ह्याच्या रक्षणासाठीच जन्म-मृत्युरहित परमात्मा लीलादेहाने अवतार घेतो.७.

युगायुगांत अवतरून कार्याच्या शेवटी त्या त्या देहांचे विसर्जन करतो. अशा रीतीने ब्रह्मदेवाच्या २८व्या चतुर्युगीत सांप्रत दिवशीं वर्तमान वाराह कल्पांत, ('सध्याच्या वैवस्वत मन्वंतरांत' अध्याहृत आहे.).८. ह्या घोर कलियुगांत आपल्या अंशापासून झालेल्या देवतांची दयाशून्यता लक्षांत घेऊन खुद्द दत्त भगवंतांनीच अवतार घेतला.

**घोर कलियुग.** अधर्माच्या प्राबल्यामुळे कली घोर झाला आहे. ह्या कलीत *'मानव सगळे धर्मभ्रष्ट व लिंगजिह्वापरायण (असतील); ब्रह्मचारी व्रतहीन, संन्यासी कुटुंबवत्सल,॥१॥ स्त्रिया कामासक्त तर गृहस्थ आचारहीन (असतील). ते देहाने छोटे, खूप खाणारे, मंदभागी, निर्लज्ज,॥२॥ स्त्रीलंपट, विपुल संतति असलेले, मूर्ख आणि आपल्या नातेवाइकांना आणि मित्रांना सोडणारे,॥३॥ स्त्रिया पतीची अवज्ञा करणाऱ्या, तर पुत्र पित्याचा द्रोह करणारे; नोकर धन्याला टाकणारे तर शिष्य पूर्णपणे गुरूला ठकविणारे!॥४॥ म्लेच्छप्राय राज्यकर्ते प्रजेचे आर्थिक दृष्ट्या भक्षण करतील, ब्राह्मण कवडीसाठीही वेदांचा विक्रय करणारे, दुष्ट,॥५॥ प्रतिग्रह आणि परस्त्री यांच्या मागे लागल्याने सिद्धिविवर्जित असतील. उच्चवर्णीय लोक हीन व्यवसाय करतील तर हीन लोक श्रेष्ठांचे॥६॥ यज्ञयाग बंद झाल्याने वृष्टी आणि अन्न कुठेकुठेच उपलब्ध होईल (दुष्काळसदृश स्थिती).*

**दारुणेऽस्मिन्कलौ प्राप्ते ज्ञात्वा स्वांशांशजोतयः। दयोना इत्याविरासीद्दत्तस्तु भगवान्स्वयम् ।।९।।**

अस्मिन् दारुणे कलौ प्राप्ते स्व+अंश+अंश+ज+ऊतयः दया+ऊना इति ज्ञात्वा स्वयं भगवान् दत्तः तु आविरासीत्।९।

*पुरुष १६व्या वर्षी म्हातारे होतील (केस पांढरे) तर १० वर्षाच्या मुली माता होतील.।।७।। राज्यकर्तेच चोर, धर्मांत पाखण्डच अधिक, सर्व वर्ण शूद्रप्राय आणि मेंढीएवढ्या गाई।।८।। घरासारखे (भोगसाधनांनी समृद्ध) मठादिक तर घरे ओसाड होतील. वनस्पती अणूंप्रमाणे सूक्ष्म तर वृक्ष शमीप्रमाणे लहान।।९।। ढग नुसते विजेसारखे चमकतील (वर्षणार नाहीत); असे सर्व कलियुगांत घडणार आहे.* (दत्तपुराण ८:८:२३-३२) अशा ह्या दारुण कलीच्या काळांत **स्वांशांशजोतयः** स्वांश म्हणजे आपला अंश ब्रह्मदेव, त्याचे अंश मरीचि, कश्यपादि मानसपुत्र, त्यांपासून जन्मलेले इन्द्र, मरुद्गण, वसु, आदित्य इत्यादि **ऊतयः** विभूति म्हणजे देवता माणसाच्या पापामुळे त्यांच्याविषयी तिरस्काराने **दयोना** निर्दय झाल्या **इति** असे जाणून **स्वयं भगवान् दत्तस्तु आविरासीत्** स्वतः भगवान् दत्तांनी अवतार घेतला. ज्याप्रमाणे नोकरचाकरांवर कार्य सोपवलेले असले तरी ते सर्व दमून भागून गेल्यावर एखादे तांतडीचे कार्य उपस्थित झाले असतां स्वतः मालकच काम करूं लागतो आणि त्याला पाहून थकलेले असले तरी ते नोकर आपसुकच कामाला लागतात त्याप्रमाणे. असे न मानल्यास देव विषम (म्हणजे पक्षपाती) आहे असे वाटेल.९.

**स कृष्णामरजातीर-विहारी लोकपावनीः । भिक्ष्वात्मनात्र सल्लीलाः कृत्वाऽदृश्योऽस्ति तत्र हि ।।१०।।**
**ॐकारोच्चारणं जातमात्रेण नयनं तथा । स्वर्णतामयसोऽभ्यासमृतेऽपि ब्रह्मपाठनम् ।।११।।**
**तत्त्वोपदेशनं पित्रोर्बाल्ये तीर्थाटनं तथा । योगाख्यापनसंन्यास-वर्त्मसंस्थापनेऽन्यथा ।।१२।।**

सः कृष्णा+अमरजा+तीर+विहारी भिक्षु+आत्मनः लोक+पावनीः सत्+लीलाः कृत्वा तत्र अदृश्यः अस्ति हि।१०। जातमात्रेण ॐकार+उच्चारणं, तथा अयसः स्वर्णतां नयनं, अभ्यासं ऋते अपि ब्रह्म+पाठनम्।११। पित्रोः तत्त्व+उपदेशनं, तीर्थ+अटनं तथा योग+आख्यापनं+संन्यास+वर्त्म+संस्थापने अन्यथा..।१२।

तो कृष्णा आणि अमरजा यांच्या तीरांवर विहरणारा, संन्यासी रूपानें, लोकांना पावन करणारा मंगल लीला करून तिथे अदृश्य रूपांत आहेच. **स** तो अवतरलेला प्रभु. भिक्षु = संन्यासी. नास्तिकांना अदृश्य असला तरी भक्तांना (तसा) नाही. (म्हणजे भक्तांना आजही दर्शन देतो.) **हि** प्रसिद्ध ह्या अर्थाने.१०. (इथून पुढे आठ श्लोकांत ह्या अवताराचे भगवत्स्वरूप अघटितघटनापटुत्वाद्वारे प्रदर्शिले आहे. यालाच अष्टश्लोकी गुरुचरित्र असेही म्हणतात.) जन्मताच ॐकाराचा उच्चार, लोखंडाचे सोने करणे, अभ्यासाविनाही वेदांचे पठण; **जातमात्रस्य** साधारण नवजात बालकाला श्वास घेण्यालाही प्रयत्नांची आवयकता असते. त्या वेळीच लोकांत प्रसिद्ध असलेले **ॐकारोच्चारणं** ह्याचे ॐकाराचे उच्चारण ह्याच्या ईश्वरत्वाचे गमक आहे. **अयसः स्वर्णतां नयनं** कांही रासायनिक प्रक्रियांनी नव्हे तर केवळ हाताच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने करणे, **अभ्यासमृते** गुरूंजवळ जाऊन अभ्यास न करतांच एकदम **ब्रह्मणो** वेदांचा **पाठनम्** पाठ करणे,११. **पित्रोः** आई-वडिलांना **तत्त्वोपदेशनं** तत्त्वज्ञानाचा उपदेश, **बाल्ये** वयाच्या आठव्या वर्षीच तीर्थयात्रेला जाऊन **योगाख्यापन** योगाचा उपदश करणे तसेच संन्यामार्गाची प्रतिष्ठापना करणे, अन्यथा (पुढील श्लोकांत वाक्य पूर्ण होते).१२.

**कथं भाव्यं द्राग्घरणं प्रतीपाचरणै रुजः । तथाऽवाचोऽपि विद्वत्ता-दानं साग्विप्रदुर्गतेः ।।१३।।**
**हरणं त्रिस्थलीयात्रा-चरणं मृतजीवनम् । वशागोदोहनं विश्व-रूपाविष्करणं यतौ ।।१४।।**
**विद्वद्गर्वापहरणं निन्द्यास्याद्वेदवाचनम्। विश्वस्ताया अवैधव्य-दानं कर्मप्रकाशनम् ।।१५।।**
**जरदेधःपल्लवतां नयनं निष्कलस्त्रियै । सुप्रजस्त्वार्पणं कुष्ठ-हरणं दृष्टिमात्रतः ।।१६।।**

(अन्यथा) कथं भाव्यम्? प्रतीप+आचरणैः रुजः द्राक् हरणं तथा अवाचः अपि विद्वत्ता+दानं, विप्र+दुर्गतेः साग् (हरणं),।१३। हरणंत्रि+स्थली+यात्रा+चरणं, मृत+जीवनं, वशा+गो+दोहनं, यतौ विश्व+रूप+आविष्करणं।१४। विद्वत्+गर्व+अपहरणं, निन्द्य+आस्यात् वेद+वाचनं, विश्वस्ताया अवैधव्य+दानं, कर्मप्रकाशनम्।१५। जरत्+एधः पल्लवतां नयनं, निष्कल+स्त्रियै सु+प्रजस्त्व+अर्पणं, दृष्टिमात्रतः कुष्ठ+हरणम्।१६।

**अन्यथा कथं भाव्यं** श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींच्या साक्षात् ईश्वरस्वरूपाशिवाय दुसऱ्या कोणत्या उपपत्तीने ह्या सर्व चमत्कारांचा उलगडा होऊं शकतो? हे पुढे वर्णिलेल्या सर्व चमत्कारांना लागू होते.१३. प्रतिकूल आचरणानेच (कुपथ्य करूनच) तात्काळ रोग घालविणे. तसेच जीभ नसलेल्या (ब्राह्मणाला) विद्वत्तेचे दान करणे, विप्राची दुरवस्था (दारिद्र) लगेच घालविणे, निमिषमात्रांत गंगानुजाला त्रिस्थळीची यात्रा घडविणे, ब्राह्मणाच्या मरण पावलेल्या मुलाला जिवंत करणे, वांझ म्हशीचे दोहन करणे; **वशागो** इथे म्हशीला अनुलक्षून आहे; किंवा *वशा अगो* अशी फोड करून गाईव्यतिरिक्त ती म्हैस असाही अर्थ करतां येईल. (त्रिविक्रम भारती) यतीला विश्वरूप दाखविणे,१४. विद्वान् ब्राह्मणांचा गर्व उतरविणे, पतिताच्या मुखाने वेदपठण, आपल्यावर विश्वासलेल्या विधवेला (तिचा मृत पती जिवंत करून) सौभाग्यदान, कर्मकांडाचे प्रकाशन,१५. जीर्ण (औदुंबर) काष्ठाला पालवी आणणे, ऋतुहीन (वृद्ध व वांझ) स्त्रीला उत्तम संतती प्राप्त करून देणे, केवळ दृष्टिक्षेपाने (नंदीचे) कुष्ठ घालविणे,१६.

**क्षणेऽष्टग्रामगमनं छिन्नसस्यविवर्धनम् । इत्यादिकं कृतं दिव्यं करोति च करिष्यति ।।१७।।**
**भपार्थिवरजोऽम्ब्वंश-गणकाः सन्तु कुत्रचित् । भूयोऽगणेयोरुगुण-गुणान्गुणयितुं ह्यलम् ।।१८।।**
**लीलाप्रादुष्कृतगुण-रूपोऽरूपोऽगुणोप्यरम् । श्रवःसृत्या प्रविश्यांतर्भक्तस्याघं धुनोत्यजः ।।१९।।**

क्षणे अष्ट+ग्राम+गमनं, छिन्न+सस्य+विवर्धनम्। इत्यादिकं दिव्यं कृतं, करोति च करिष्यति।१७। भ+पार्थिव+रज+अम्बु+अंश+गणकाः कुत्रचित् सन्तु। भूयः अगणेय उरु+गण+गुणान् गु(ग)णयितुं हि अलम्।१८। अरूपः अगुणः अजः अपि लीला+प्रादुष्कृत+गुण+रूपः श्रवः+सृत्या अंतः प्रविश्य भक्तस्य अघं धुनोति।१९।

(दिवाळीच्या) उत्सवांत (एकाच वेळी) आठ गांवीं जाणे, (अकाळी) कापलेल्या पिकाचे संवर्धन इत्यादि (चमत्कार त्या श्रीगुरूंनी) (पूर्वी) केले, (आजही) करतात व (पुढेही) करणार आहेत. आठ प्रिय भक्तांच्या प्रार्थनेनुसार आठही गांवीं जाऊन त्यांच्यासह दिवाळी साजरी केल्याची कथा पुढे येणार आहे.१७. आकाशांतील तारे, भूमीवरील धुळीचे कण किंवा (समुद्राच्या वा पावसाच्या) पाण्याचे थेंबही मोजणारे कुठे (कुणी कदाचित्) सांपडतील पण अनंतगुणसंपन्न परमेश्वराचे गुण मोजणे (कधीच संपणार नसल्याने) पुरे झाले. इथे *'विष्णोर्नु कं वीर्या..'* (ऋग्वेद सं. १:१५४:१) ह्या वेदवाक्याचा आशयच सुचविलेला आहे. *'वेवेष्टीति विष्णुः'* म्हणजेच सर्वव्यापी भगवंत त्याचे *'वीर्याणि'* पराक्रम (लीला) *'कः प्रवोचत'* कोण वर्णू शकेल? 'नु' खरोखर कुणीच नाही. *'यः पार्थिवानि रजाँसि विममे'* जो पृथ्वीवरील धूळीचे कण(ही कदाचित्) मोजील तोसुद्धां नाही. *'यो विष्णुः त्रेधा विचक्रमाणः'* तीन पावलांनी *'सधस्थं'* तेथील निवासी देवांसह *'उत्तरं लोकं'* पलीकडच्या सत्यलोकाला *'अस्कभायद्'* भिडून *'स्थः'* स्थिरावला आहे. निर्गुण आणि निराकार असूनही केवळ लीलेनेच धारण केलेल्या गुणांच्या रूपाने हा अजन्मा श्रवणेंद्रियांच्या द्वारे भक्तांच्या अंतरांत प्रवेश करून (त्यांची) पापे नष्ट करतो.१९.

**तदेकनिष्ठः पूतात्मा जीवन्मुक्तो भवेत्ततः । निर्द्वन्द्वस्यारब्धभुजो देहः पततु वा न वा ।।२०।।**
(क्षेपकः) **तत्राज्ञानसमुत्पन्न-द्वंद्वाभावः प्रवर्तते । प्रारब्धान्ते स यात्येव कैवल्यं पदमुत्तमम् ।।**
**अयं हि ब्रह्मभूयाप्ति-सत्पथो नाक्षिगोचरः । मोहान्धानामसत्संग-विवेकानां कुसंपदाम् ।।२१।।**

ततः तत्+एक+निष्ठः पूत+आत्मा जीवन्+मुक्तः भवेत्। निर्द्वन्द्वस्य आरब्ध+भुजः देहः पततु वा न वा।२०। तत्र अज्ञान+समुत्पन्नः +द्वंद्व+अभावः प्रवर्तते। सः प्रारब्ध+अन्ते उत्तमं कैवल्यं पदं याति एव।(क्षेपकः।) अयं ब्रह्म+भूय+आप्ति+सत्+पथः अ+सत्+सङ्ग+विवेकानां मोह+अन्धानां कु+संपदां न हि अक्षि+गोचरः।२१।

मग तो एकनिष्ठ भक्त शुद्धचित्त होऊन जिवंतपणीच मुक्त होतो. सुखदुःखादि द्वंद्वांपलीकडे जाऊन प्रारब्धाचा भोग घेतो; मग त्याचा देह पडो वा न पडो. **ततः** पापक्षालन झाल्यावर **तदेकनिष्ठः** भगवत्परायण असल्याने **पूतात्मा** शुद्ध म्हणजेच रागद्वेषादि विकाररहित अंतःकरण झाल्याने अपरोक्ष अनुभूति प्राप्त करून घेऊन **जीवन्मुक्तो भवेत्** जिवंतपणीच मुक्त होतो. **निर्द्वंद्वस्य** भगवद्‌गीतेत *'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः। वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते'* (२:५६) असे वर्णन केल्याप्रमाणे स्थितप्रज्ञ होऊन **आरब्धभुजः** प्रारब्ध भोग भोगत राहतो. मग **देहः** पडो वा न पडो.२०. तिथे अज्ञानजन्य द्वंद्वाचा अभावच असतो. (असा हा जीवन्मुक्त) प्रारब्ध (भोगून) संपल्यावर श्रेष्ठ असे मोक्षपद पावतो (विदेहमुक्त होतो.) (क्षेपक). मात्र हा ब्रह्मपदप्राप्तीचा सन्मार्ग संतसंगति आणि विवेक यांच्या अभावीं मोहांध झालेल्या, आसुरी संपदेचा आश्रय केलेल्यांच्या डोळ्यांना दिसत नाही.

गरुडपुराणांत सांगितल्याप्रमाणे, 'सत्सङ्गश्च विवेकश्च निर्मलं लोचनद्वयम्। यस्य नाऽस्ति नरः सोऽन्धः कथं न स्यादमार्गगः।।' सत्संग आणि विवेक हे दोन स्वच्छ नेत्र ज्याला नाहीत तो मानव आंधळाच होय. (मग) तो आडवाटेला लागणार नाही का? नाकापासून कानापर्यंत पसरलेले दोन डोळे असलेल्यांना डोळस मानले तरी सूक्ष्म कार्याची पाहणी सत्संग आणि विवेक ह्याच नेत्रद्वयांनी होते. त्यांचा अभाव असणारा आंधळाच होय. म्हणून तो आडवाटेला - म्हणजे दुराचरणाने पशु आदि योनींच्या गतीला जातो (विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे। वासुदेव निर्मल देहे जेणे त्वत्पदिं राहे।।).२१.

**कृतस्ववर्णाश्रमदृष्टकर्मा विद्वान् सदिष्टो गुरुदेवभक्तः ।**
**इहैव भुक्तिं च लभेत मुक्तिं संन्यास्यनेनैव पथा स योगी ।।२२।।**

कृत+स्व+वर्ण+आश्रम+दृष्ट+कर्मा सत्+इष्टः गुरु+देव+भक्तः विद्+वान् सः योगी संन्यासी (च भूत्वा) अनेन एव पथा इह एव भुक्तिं मुक्तिं च लभेत।२२।

आपल्या वर्णाला आणि आश्रमाला उचित असे कर्म केल्याने तो संतांचा लाडका होतो. त्याच कारणाने तो सद्गुरू आणि ईश्वर यांचा उपासक होतो. याच मार्गाने तो गीतेच्या वचनानुसार *('अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः। स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः' ।।६:१।।)* विद्वान् म्हणजे ज्ञानी होतो. विहित कर्माचे निष्काम अनुष्ठान केल्याने विविदिषा उत्पन्न होते आणि ईश्वराभिन्न सद्गुरूंची भक्ती हीच उपासना केल्याने चित्ताला एकाग्रता येते. तिच्या योगाने वेदांत निर्देशिलेली शमदमादि (*'शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति।'* सुबालोपनिषत् ९:१४) आत्मविद्येची अंतरंग साधने सिद्ध होतात. अशा रीतीने आत्मज्ञानाचा मुख्य अधिकारी झाल्यावर सद्गुरूंना शरण जाऊन श्रवणादींनी **विद्वान् सन्** ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुक्तीचा लाभ करून घेतो. तसेच तैत्तिरीय उपनिषदांत (आनंदवल्ली) वर्णन केलेल्या सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंतच्या एकाहून एक शंभरपट आनंदांचा भोगही घेतो. मोक्षाच्या ठायीं कामादिविषयांचा भोग वस्तुतः नसतो. तथापि विषयांनंदांचा समावेश ब्रह्मानंदांत अंशत्वाने असल्याने ब्रह्मानंदाची प्राप्ती झाली की सर्व विषयांचा भोग घेतल्यासारखाच होतो. वेदांतसूत्रांत (*'ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्।'* ३:४:५१) सांगितल्याप्रमाणे (प्रारब्धाचा) प्रतिबंध नसेल तर ह्याच जन्मांत तो मुक्त होतो. अन्यथा प्रतिबंध असेल तर तो जन्मातराने मुक्त होतो.२२.

**एवं सुवृत्तं महिमानमीशितुः श्रुत्वास्य भीमामरजागमे ययौ ।**
**कश्चिद्भवभ्रष्टमनाः स्तुवन्गुरुं तप्तः शरण्यं श्रितकल्पशाखिनम् ।।२३।।**
**गणेशं शारदां नत्वा श्रीगुरुं नामधारकः। द्विजस्तुष्टाव घोरेऽत्र नृधाम्ना विश्रुतं हरिम् ।।२४।।**

एवं अस्य ईशितुः सुवृत्तं महिमानं श्रुत्वा कश्चित् तप्तः भव+भ्रष्ट+मनाः श्रित+कल्प+शाखिनं शरण्यं गुरुं स्तुवन् भीमा+अमरजा+गमे ययौ।२३। नामधारकः द्विजः गणेशं शारदां श्रीगुरुं नत्वा अत्र घोरे नृ+धाम्ना विश्रुतं हरिं तुष्टाव।२४।

ह्या पहिल्या २२ लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी द्विसाहस्री या आपल्या गुरुचरित्राच्या अनुवादात्मक ग्रंथाचा उपोद्घात केला आहे. मंगलाचरण, चरित्रनायक, ग्रंथाचा विषय, अधिकारी, सूत्ररूप चरित्र, भगवद्गुणांच्या श्रवणकीर्तनाचे माहात्म्य इत्यादि विषय यांत आले आहेत. आतां पुढील लोकापासून मूळ श्रीगुरुचरित्राचा उपोद्घात उर्वरित अध्यायांत अनुवादला आहे. असे हे भगवान दत्तात्रेयांचे शुभ वर्तमान व माहात्म्य ऐकून (आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक अशा त्रिविध तापांनी) पोळलेला आणि त्यामुळेच संसाराला विटलेला विरक्त असा कोणी एक ब्राह्मण श्रीगुरूंची स्तुती करीत भीमामरजा संगमावर लीलेने निवास करणाऱ्या, लोकांना मात्र पादुकारूपानेच दिसणाऱ्या, स्वभक्तांचा कल्पवृक्ष आणि म्हणूनच शरण जाण्याला योग्य अशा भगवंताकडे गेला.२३. त्या नामधारक नांवाच्या ब्राह्मणाने श्रीगणेश आणि शारदा यांना वंदन करून या घोर कलियुगांत मनुष्यरूपाने (अवतरलेल्या) सुप्रसिद्ध दैन्य, दुःख, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. सरस्वतीपंत ह्या नांवाने प्रसिद्ध आणि श्रीगंगाधरांचा पुत्र असणाऱ्या त्या ब्राह्मणाने आपल्या अभिमानाच्या परिहारासाठी नामधारक हे कल्पित नांव घेतले. ऐतरेय आरण्यकांत (*'तस्य वाक्तन्तिर्नामानि दामानि तस्येदं वाचातन्त्या नामभिर्दामभिः सर्वं सितम्।'* २:१:६) म्हटल्याप्रमाणे नाम हे दाम म्हणजे बंधन आहे. श्रीदत्तप्रभूंच्या साक्षात् दर्शनाच्या इच्छेने त्यांना स्तुतीने प्रसन्न करण्यासाठी, प्रथम निर्विघ्नसिद्धीसाठी गणेशादींना वंदन करून ह्या घोर कलियुगांत नरहरि नांव धारण केलेल्या दत्तात्रेयांचे स्तवन करूं लागला.२४.

**सर्वज्ञ मां न जानीषे विश्वसाक्षिन्न चेक्षसे । विलापो न श्रुतो विष्णो मम श्रुत्वाप्युपेक्षसे ॥२५॥**
**चेज्ज्ञातेऽत्र क्व वैक्लव्यं कथं दैन्यं त्वयेक्षिते । श्रुते चेच्छुक्कुतोऽप्यर्हा त्वय्युपेक्षा दयानिधे ॥२६॥**
**सर्वदेवेश्वरोऽपि त्वं त्वं नोऽपि कुलदैवतम् । त्वां हित्वा कतमं याचे वेद्मीशन्त्वापि वेत्सि माम् ॥२७॥**

(हे) सर्वज्ञ (अपि) मां न जानीषे? (हे) विश्व+साक्षिन् न च ईक्षसे? (हे) विष्णो मम विलापः न श्रुतः? श्रुत्वा अपि उपक्षसे (किम्)।२५। चेत् ज्ञाते अत्र क्व वैक्लव्यम्? त्वया ईक्षिते कथं दैन्यम्? श्रुते चेत् कुतः शुक्? (हे) दया+निधे त्वयि उपेक्षा अर्हा अपि?।२६। त्वं सर्व+देव+ईश्वरः अपि, त्वं नः कुल+दैवतं अपि। (हे) ईश, त्वां हित्वा कतमं याचे? त्वां वेद्मि (त्वं) अपि मां वेत्सि।२७।

हे सर्वज्ञा, तूं मला ओळखत नाहीस (का?) हे विश्वसाक्षी देवा, तू मला पाहत नाहीस (का?) हे व्यापनशीला माझा शोक तू ऐकत नाहीस (का?) कीं तू ऐकूनसुद्धा उपेक्षा करतो आहेस? मुण्डकोपनिषदानुसार (*'यः सर्वज्ञः सर्ववित्।'* १:१:९) हे सर्वज्ञा, मला ओळखत नाहीस का? इथे **अपि** प्रश्नार्थक आहे. (अमरकोश ३:३:२४९). विशेषणांची योजना हेतुगर्भ आहे. सर्वज्ञ असूनही मला कसा जाणत नाहीस? विश्वसाक्षी असून मीच कसा दिसत नाही? सर्वव्यापी असूनही माझा विलाप ऐकत नाहीस? असा भावार्थ.२५. देवाला उद्देशून योजलेली सर्वही संबोधने अन्वर्थक असूनही विपरीत अनुभव का येतो आहे हे या श्लोकांत विचारले आहे. जर तू मला ओळखतोस तर मग मी असा विह्वळ का? जर तू (माझ्याकडे) पाहत असशील तर माझे दैन्य कसे आहे? (माझा विलाप) तुझ्या कानांवर पडूनही (माझा) शोक (अजूनही) कसा राहिला? हे दयासागरा, तुला ही उपेक्षा शोभते का? अर्थात् मुळीच नाही!२६. 'अरे कार्याला उशीर लागतो. उशीर सहन होत नसेल तर आणखी कुठल्या तरी देवाकडे जा.' असे म्हणाल तर आपल्यासारखा दुसरा (समर्थ) कोणी नाही हे सांगतात. आपणच सर्व देवांचे अधिदेव आहां. आमचे कुलदैवत आहां. आपल्याला सोडून कुणाकडे (कोणत्या इतर देवाकडे) याचना करूं? 'कशावरून?' म्हणाल तर मी आपल्याला सर्व देवांचा देव म्हणून शब्दप्रमाणाने जाणतो. कारण आपणच गीतेत *'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः'* (१५:१५) असे सांगितले आहे. आपण तर मला भक्ताला प्रत्यक्षच जाणतां.२७.

**सर्वोऽपि वेत्ति भूपं न भूपः सर्वन्तथोचितम् । अज्ञे तु त्वयि सर्वज्ञे कथं श्लाघ्यमिदं प्रभो ।।२८।।**
**नासेवकायादात्रेऽपि चेद्दास्यस्युचितं न तत् । सेवेच्छुः श्रीश किं दाता तद्वत्प्रत्युपकार्यपि ।।२९।।**
**ज्योतिर्द्योतमिहाब्दोम्बु सेवोनेऽर्पयति ध्रुवे । पदं बिभीषणेऽदात्रोर्दत्तं मे देह्यतः प्रियम् ।।३०।।**

सर्वाः अपि भूपं वेत्ति, न भूपः सर्वम्। तथा तु अज्ञे(भूपे) उचितम्। (हे) प्रभो त्वयि सर्वज्ञे इदं कथं श्लाघ्यम्?।२८। असेवकाय अदात्रे अपि न दास्यसि इति चेत् न तत् उचितम्। (हे) श्री+ईश, सेवा+इच्छुः तत् वत् प्रति+उपकारी अपि दाता किम्?।२९। इह ज्योतिः द्योतं, अब्दः अम्बु, सेवा+ऊने अर्पयति। अदात्रोः ध्रुवे, बिभीषणे (च) पदं दत्तम्। अतः मम प्रियं देहि।३०।

'राजाला सगळे ओळखतात पण राजा सर्वांना (विशेषतः) ओळखत नाही; तसेच हे आहे' असे आपण म्हणाल तर अल्पज्ञ राजाच्या बाबतीत हे कदाचित् योग्य ठरेल पण आपण तर सर्वज्ञ आहांत. आपल्याला हे कसे शोभेल?२८. ते असो! सेवा न करणाऱ्याला व (कांही) न देणाऱ्याला आपण देत नाही असे म्हणणेही आपल्याला योग्य नाही. आपण श्री म्हणजे अव्याहत ऐश्वर्याचे धनी आहांत. या विशेषणाने दान देण्याची क्षमता आणि औदार्य आपल्या ठिकाणी आहे हे सुचविले आहे. सेवेची अपेक्षा करणाऱ्याला दाता म्हणतां येईल का? किंवा सेवेच्या अपेक्षेने दान करणारा *किंदाता* निकृष्ट दाता ठरेल. तेच प्रत्युपकारकर्त्याविषयीही म्हणता येईल. सीतेच्या शोधानंतर हनुमंताला श्रीरामप्रभु म्हणतात 'हे वानरश्रेष्ठ! तुझा हा उपकार माझ्यांतच जिरून जावो. प्रत्युपकाराची अपेक्षा करणारा माणूस उपकारकर्त्यावर विपत्ति येण्याची इच्छा करतो.' (*'मय्येव जीर्णतां यातु उपकारो हरे तव। नरः प्रत्युपकारार्थी विपत्तिमभिवाञ्छति।।'* उत्तरकांड ४०:२४).२९. 'तरी अशा प्रकारचे दान कुठे पाहिलंस का?' असा प्रश्न अपेक्षून म्हणतात. इथे (इहलोकी) सूर्यचंद्राग्निरूप ज्योति प्रकाशाचे, तसेच मेघ पाण्याचे दान, सेवा न करणाऱ्याही सर्व लोकांना देतात. आपल्याला कांहींच न दिलेल्या ध्रुव आणि बिभीषण या दोघांना अढळपद आणि राज्य आपणच दिले आहे. तरी मला माझे प्रिय असे तुझे दर्शन दे.३०.

**निधयस्तेऽनुगा दास्यः सिद्धयः श्रीस्तु किङ्करी । तत्ते किं भगवन्देयं किं कार्यं परिपूर्ण ते ।।३१।।**
**स्वसेवककुलं भूमौ पालयन्ति नृपा अपि । कुतो मोपेक्षसे दीनं मत्पूर्वार्चित विश्वभृत् ।।३२।।**
**देवेश मेऽपराधैश्चेदायास्यन्तर्विषादताम् । पत्ताडितार्भकैः किं नु प्रसू रुष्यति मानुषी ।।३३।।**

(हे) भगवन्, निधयः ते अनुगाः, सिद्धयः दास्यः, श्रीः तु किङ्करी। तत् (हे) परिपूर्ण ते किं देयम्? ते किं कार्यम्?।३१। भूमौ नृपाः अपि स्व+सेवक+कुलं पालयन्ति। (हे) विश्व+भृत्, मत्+पूर्व+अर्चित कुतः मां दीनं उपेक्षसे?।३२। (हे) देव+ईश, चेत् मे अपराधैः विषादतां आयास्यन्तः, मानुषी (अपि) प्रसू पत्+ताडित+अर्भकैः रुष्यति किम्?।३३।

'त्या वेळी दिले. आतां थोडे घेऊन देतो' असे म्हणाल तर निधि आपले अनुचर आहेत, सिद्धी आपल्या दासी आहेत, साक्षात् लक्ष्मी आपल्या चरणाची सेवा करते, आपल्याला काय देतां येईल? अर्थात् कांहीच नाही. किंवा आपण नित्यच परिपूर्ण असल्याने आपले कांही कार्यही करतां येणार नाही.३१. याउप्परही आपण अपेक्षा करीत असाल तर असे पहा, ह्या भूलोकांत मनुष्यांतील राजेसुद्धा आपल्या नोकरांच्या वंशजांचे पालन करतात ना? माझ्या वाडवडिलांनी पूजलेल्या देवा, मज दीनाची का उपेक्षा करतोस? इथे मी जरी सेवा केली नसली तरी माझ्या पूर्वजांच्या सेवेचा विचार करून माझी उपेक्षा करूं नका असे सुचविले आहे. **विश्वभृत्** विश्वाच्या पोशिंद्या, असे संबोधन योजून माझा विश्वांतच अंतर्भाव असल्याने माझ्या भरणपोषणाची जबाबदारी आपलीच आहे असे म्हणायचे आहे. नाही तर मला विश्वाच्या बाहेर करावे लागेल असा भाव आहे.३२. किंवा हे देवाधिदेवा, माझ्या अपराधांनी आपल्याला राग आला असे म्हणावे तर गर्भांत किंवा मांडीवर असलेल्या लेंकराने लाथा मारल्या तरी मानवी माता रागावते का? मुळीच नाही! मग देवांचेही देव असलेल्या आपल्याला असा रोष शोभत नाही.३३.

**जीवनं पितरौ यत्र भिन्नावन्यतराच्छिशोः । त्वं तूभयं मे किं कार्यं निर्घृणे विश्वभृत्त्वयि ।।३४।।**
**साहसं कुरु मेत्युक्त्वा यथा दारु भिनत्ति विः । तथा साहजिकैर्दोषैर्निन्दाम्यंहः करोम्यहम् ।।३५।।**

यत्र पितरौ भिन्नौ अन्यतरात् शिशोः जीवनम्। मे तु त्वं उभयम्। (हे) विश्वभृत्, त्वयि निर्घृणे किं कार्यम्?।३४। 'साहसं मा कुरु' इति उक्त्वा यथा विः दारु भिनत्ति तथा साहजिकैः दोषैः अहं निन्दामि, अहः करोमि।३५।

तसे तर (वेदांतदृष्ट्या) या जगताचे उपादान कारण आणि निमित्त कारणही तुझ्याकडेच येते; (कारण तूच हे विश्व स्वतःपासूनच निर्माण केले आहे. *'स ईक्षत लोकान्नु सृजा'* इत्यादिना तुझे निमित्तत्व, तर *'तदाऽऽत्मानँ स्वयमकुरुत्'* या वाक्याने उपादानतत्व, सिद्ध होते. अशा रीतीने तुझे अभिन्न निमित्तोपादानत्व वेदप्रामाणित आहचे. पण लौकिक अथवा सांख्य दृष्ट्या जरी विचार केला तर बालकाचे (वेदांत न जाणणाऱ्या जीवाचे) माता आणि पिता दोघे निरनिराळे असल्याने शिशूची उपजीविका त्यांच्यापैकी एकाकडूनही होऊं शकते. (इथे **पितरौ** ह्याचा अर्थ एकशेष द्वंद्व समासानुसार माता आणि पिता असा होतो.) तू तर सर्वेश्वर असल्याने, उपनिषदांवर विश्वासलेल्या मला दोन्ही - माता आणि पिता, आहेस. आपणच गीतेत (९:१७) 'मीच या जगाचा पिता, माता, पालनकर्ता आणि पितामहसुद्धा आहे.' असे म्हटले आहे. तरी हे विश्वपालका, आपणच असे कठोर झाल्यावर (निदान तसे मला भासत असतां) मी काय बरे करावे?३४. 'मग हे अपराधरूपी पाप तू करतोसच का?' असे विचारशील तर ते माझ्या सहज (प्राकृतिक) दोषाने घडते आहे हे दृष्टांतासह स्पष्ट करतात. कोणी एक पक्षी 'साहस करू नये' असे म्हणत असतांनाच स्वतःच लाकूड पोखरत असतो. तद्वत्च मी माझ्या साहजिक दोषांनीच हे आपली निंदारूपी पाप करतो आहे.३५.

**आघे पुण्यवतः प्रोक्तं प्रायश्चित्तमवेक्ष्य माम् । आरात्पलायते भीत्या शार्दूलमिव शृङ्गिणी ।।३६।।**

**मालिन्यदोषभीत्या तु माषराशेः पृथक्किमु । कार्यं जपो मदङ्गाघात्किं करोति पृथग्घरे ।।३७।।**

**मादृक्पापो हरे नास्ति भवादृङ् नास्ति पापहा । पाह्यनन्याश्रयं दीनं त्यक्त्वौदासीन्यमीश माम् ।।३८।।**

पुण्यवतः आघे प्रोक्तं प्रायश्चित्तं मां अवेक्ष्य, शार्दूलं शृङ्गिणी इव आरात् पलायते।३६। मालिन्य+दोष+भीत्या तु माष+राशेः किं पृथक् कार्यम्? (हे) हरे, मत्+अङ्ग+अघात् जपः किं पृथक् करोति?।३७। (हे) हरे, मादृक् पापः न अस्ति, भवादृक् पापहा न अस्ति। औदासीन्यं त्यक्त्वा मां दीनं अन्+अन्य+आश्रयं पाहि।३८।

'अरे मग प्रायश्चित्त कर!' असे म्हणशील तर *'विध्यपराधे प्रायश्चित्तम्'* ह्या श्रौतसूत्रानुसार पुण्यवान माणसाने थोडेफार पाप केले तर त्याचा दोष परिहार करण्यासाठी ऋषिमुनींनी जे प्रायचित्त सांगितले आहे ते माझ्यासारख्या महापाप्याला पाहून, सिंहाला पाहून धावणाऱ्या गाईसारखी, लांबूनच पळून जातात.३६. जपादींनी पापाचा परिहार करायला आपण सांगाल तर मलिनतेच्या भयाने माझ्या देहांतून पाप वेगळे करणे हे उडदाच्या राशींतून काळेपणा दूर करण्यासारखे दुरापास्त आहे. जप तेथे काय करील? हे हरी अशा संबोधनाने *'नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी जन'* ह्या स्कंदपुराणांतील वचनानुसार (वैष्णवखंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३) परमेश्वराच्या नांवांत ही शक्ती आहे असेच सुचविले आहे.३७. हे हरी माझ्यासारखा पापी नाही आणि आपल्यासारखा पाप घालविणारा नाही. अशा रीतीने दुसरा कांहीही आधार नसलेल्या मला दीनाला, हे ईश्वरा, आपली उदासीनता सोडून माझे रक्षण करा.३८.

**द्रवन्त्यपि शिलाः श्रुत्वा मद्विलापं दयानिधे । कारुण्यं ते कुतो यातं म्रियमाणं न वेत्सि यत् ।।३९।।**
**एवं विलाप्य मार्गेऽसौ गुरुध्यानैकतानहृत् । तस्थौ प्रायोपवेशेन दैवात्स्वप्नस्तदाभवत् ।।४०।।**
**धेनुर्वत्सं यथोपैति भगवान्भक्तवत्सलः । प्राप्यावधूतवेषेण स्वप्नेऽमुं पर्यतोषयत् ।।४१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते चरितानुसंधानं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

(हे) दयानिधे मत्+विलापं श्रुत्वा शिलाः अपि द्रवन्ति। (हे) करुणा+निधे ते कारुण्यं कुतः यातं, यत् म्रियमाणं न वेत्सि?।३९। एवं असौ मार्गे विलाप्य गुरु+ध्यान+एकतान+हृत् प्रायोपवेशनेन तस्थौ। तदा दैवात् स्वप्नः अभवत्।४०। यथा धेनुः वत्सं उपैति (तथा) भक्तवत्सलः भगवान् अवधूत+वेषेण प्राप्य अमुं स्वप्ने पर्यतोषयत्।४१।

'मी कुठे औदासीन्य धारण केले आहे?' असा प्रश्न अपेक्षून पुढे सांगतात. हे दयासागरा, हृदयशून्य अशा पाषाणांनासुद्धां पाझर फोडणारा माझा शोक ऐकूनसुद्धा आपल्यावर त्याचा कांहीच परिणाम दिसत नाही आणि मरणासन्न अशा माझ्याकडे आपण लक्ष देत नाही. आपलें कारुण्य कुठे हो गेले?३९. अशा प्रकारे हा नामधारक शोक करीत वाटेमध्ये गुरुप्राप्तीचा उपाय म्हणून अनन्य चित्ताने गुरुचिंतनांत मग्न होऊन प्रायोपवेशन करीत राहिला. *'संन्यासवत्यनशने पुमान् प्रायः'* ह्या अमरकोशांत सांगितलेल्या लक्षणाप्रमाणे (२:७:५२) सर्वसंगपरित्याग करून आमरण उपोषणाला बसला. त्या वेळी ध्याननिष्ठ असूनही चित्तांत लय म्हणजे निद्रेचा प्रादुर्भाव करणाऱ्या प्राक्तनयोगाने, जागेपणीही सत्याची प्रचीती देणारे स्वप्न झाले. मिथ्या स्वप्नदर्शनांतूनही सत्याची प्रचीती होऊं शकते याला प्रमाण म्हणून भगवत्पूज्यपादाचार्यांच्या शतश्लोकींतील (३८) वचन उद्धृत केले आहे. *'स्वाप्नादेव प्रसादादभिलषितफलं*

*सत्यतां प्रातरेति। सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति..'*.४०. नवप्रसूत गाय (भगवंताचे वात्सल्य प्रकट करणारा हा दृष्टांत आहे) जशी वासराकडे (धांवून) जाते त्याप्रमाणेच भक्तवत्सल भगवंतांनी अवधूतवेषाने स्वप्नांत येऊन ह्या नामधारकाचे समाधान केले.४१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील पहिला अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ज्ञानयोगः।

### ।। अथ द्वितीयोऽध्यायः ।।

**तत उत्थाय नालोक्य स्वप्ने दृष्टं द्विजोभितः । ध्यात्वा व्रजन्ददर्शाग्रे दयार्द्रं योगिनं समम् ।।१।।**
**अभिवाद्य स तं हर्ष-पुलकोद्गमशोभितः । प्रेमगद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे ।।२।।**
**माता पितोपदेष्टा भी-हर्ता भर्तापि मे भवान् । क्वायातोऽस्ति कुतो गन्ता दिष्ट्या मेऽद्याक्षिगोचरः ।।३।।**

तत उत्थाय द्विजः स्वप्ने दृष्टं अभितः न आलोक्य ध्यात्वा व्रजन् अग्रे दयार्द्रं समं योगिनं ददर्श।१। सः पुलक+उद्गम+शोभितः तं अभिवाद्य प्रेम+गद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे।२। भवान् मे माता, पिता, उपदेष्टा, भी+हर्ता अपि। क्व आयातः असि? कुतो गन्ता? अद्य दिष्ट्या मे अक्षि+गोचरः।३।

**द्वितीयाध्यायी ब्रह्मोक्त गुरुशिष्यकथा । सांगे सिद्ध नामधारका भक्ति दृढ करावया ।।१।।**

तेव्हां, स्वप्नानंतर उठून, स्वप्नांत पाहिलेला तो पुरुष आतां न दिसल्याने तो ब्राह्मण त्या पुरुषाला मनांत आठवीत आसपास धुंडाळून जातां समोरच दयार्द्र शत्रुमित्रभावरहित असा स्वप्नांत पाहिलेला योगी त्याला दिसला.१. नामधारकाने त्या योगी पुरुषाला अभिवादन केले आणि आनंदाने पुलकित होऊन प्रेमाने गहिंवरलेल्या वाचेने बोलण्यास आरंभ केला.२. साधारणतः सर्वांना माता, पिता, गुरू इत्यादि उपकारकर्ते असतात. माझ्यासाठी मात्र परमानंद देणारे आपणच हे सर्व आहांत. अथवा 'आम्हांला अविद्येच्या पलीकडे तारून नेणारा तूंच आमचा पिता आहेस' या श्रुतीने (प्रश्न उ. ६.८) सांगितल्याप्रमाणे अध्यात्मज्ञान देण्यास समर्थ असे आपणच मला मातादिक आहांत. तसेच ज्ञानी पुरुष ईश्वराशी एकरूपच असल्याने *'पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः'* या गीतावचनाप्रमाणे (९:१६) आपणच सर्व विश्वाचेच मातापिता आहांत. महाराज, आपण कुठून आलां आहांत व कुठे जात आहां? (उलटसुलट अव्ययाची योजना नामधारकाच्या संभ्रमाने झाली आहे.) माझ्या सुदैवाने आज आपण माझ्या दृष्टीस पडलां आहांत.३.

**कालेऽनुकूले प्रतीपे ना स्वैः सद्भिश्च युज्यते । निःसंगस्य मुमूर्षोर्मे सर्व एवाद्य वै भवान् ।।४।।**
**नामधारकशर्माहं विप्रस्तप्तोऽत्र सद्गुरुम् । द्रष्टुकामोऽयने क्लेशान्मुमूर्षुरभवं प्रभो ।।५।।**
**इन्द्रियोच्छोषणं शोकं कोऽपि हर्तुं न मे प्रभुः । जाने त्वमेव शक्नोषि हृष्टं दृष्ट्यैव हृद्धि मे ।।६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**योगिध्येयस्त्रिमूर्त्यात्मा यद्भक्ता भुक्तिमुक्तिगाः । योऽस्ति भीमातटेऽसौ तच्छिष्यः सिद्धो धराचरः ।।७।।**

अनुकूले, प्रतीपे काले स्वैः, सद्भिः च युज्यते। मे निःसङ्गस्य मुमूर्षोः भवान् एव सर्व वै।४। (हे) प्रभो, अहं नामधारक+शर्मा विप्रः तप्तः अत्र सद्गुरुं द्रष्टु+कामः अयने क्लेशात् मुमुर्षुः अभवम्।५। मे इन्द्रिय+उच्छोषणं शोकं हर्तुं कः अपि न प्रभुः। जाने त्वं एव शक्नः असि (यतः) दृष्ट्या एव मे हृत् हृष्टं हि।६। सिद्ध उवाच। योगि+ध्येयः त्रि+मूर्ति+आत्मा यत्+भक्ताः भुक्ति+मुक्ति+गाः, यः भीमा+तटे अस्ति, असौ तत्+शिष्यः धरा+चरः सिद्धः।७।

**ना** म्हणजे पुरुषाला अर्थादिकांची अनुकूलता असतांना आपल्या सख्यासोयऱ्यांची सोबत असते. प्रतिकूल काळीं मात्र (सखेसोयरे दुरावल्याने) संतांचाच आश्रय असतो. स्त्रीपुत्रादिकांपासून वियुक्त होऊन मरणोन्मुख झालेल्या माझे खरोखर आपणच सर्व कांही आहांत.४. नामधारक नांवाचा मी ब्राह्मण आहे आणि सदुगुरूंच्या दर्शनाला निघालो असतां मार्गांत झालेल्या कष्टांनी मी मरायला टेकलो आहे. इथे शर्मा शब्दांत ब्राह्मण जातीचा उल्लेख असूनही पुन्हां विप्र शब्दाची योजना नामधारकाचे वेदाध्ययन झाले आहे हे सुचविण्यासाठी केली आहे.५. माझ्या सर्व इंद्रियांचे शोषण करणाऱ्या ह्या शोकाचा परिहार करण्यास कुणीच समर्थ नाही. आपणच ते करूं शकाल असे जाणवते; कारण आपल्या दर्शनानेच माझ्या मनाला हर्ष झाला आहे.६. सिद्धमुनी उत्तर देतात. 'योगी ज्याचे ध्यान करतात, ज्याचे भक्त ऐहिक सुख तसेच मोक्ष पावतात अशा ह्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तिस्वरूप किंवा सत्-चित्-आनंदस्वरूप असलेल्या, भीमातीरी वास करणाऱ्या (श्रीदत्तप्रभूंचा) सिद्ध नांवाचा मी शिष्य असून ह्या पृथ्वीवर (योगबलाने अव्याहत, स्वैर गतीने) संचार करतो. तिसऱ्या श्लोकांत 'कुठून आलांत व कुठे जातां' असा प्रश्न विचारला त्याचे हे उत्तर आहे.'७.

**।। नामधारक उवाच ।।**

**सद्गुरुः सोऽपि भगवानस्माकं कुलदैवतम् । श्रद्धाभक्त्या भजे तं मां कष्टाब्धौ मज्जयत्यहो ।।८।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**स सद्गुरुस्त्रिमूर्त्यात्मा रुष्टेष्वन्येष्वयं प्रभुः । कोऽपि नास्मिन्लौकिकेऽपि नेष्टोऽस्यासीति भाति मे ।।९।।**
**संशयात्माऽश्रद्दधानः क्वापि कैर्नैव गोप्यते । त्रय्यात्मश्रीगुरुस्त्यक्त-संशयात्मेश्वरोऽत्र कः ।।१०।।**

नामधारक उवाच। सः सद्गुरुः भगवान् अस्माकं अपि कुल+दैवतम्। तं श्रद्धा+भक्त्या भजे। अहो कष्ट+अब्धौ मज्जयति।८। सिद्ध उवाच। सः सद्गुरुः त्रि+मूर्ति+आत्मा अन्येषु रुष्टेषु अयं प्रभुः। अस्मिन् (रुष्टे) कः अपि (प्रभुः) न, लौकिके अपि (रुष्टे कः अपि प्रभुः न।) (त्वं तस्य) इष्टः न असि इति मे भाति।९। अश्रद्दधानः संशय+आत्मा क्वः अपि कैः न एव गोप्यते। त्रयि+आत्म+श्रीगुरु+त्यक्त+संशय+आत्मा+ईश्वरः कः।१०।

तोच सद्‌गुरू भगवान् दत्त आमचे कुलदैवत आहे. अहो, श्रद्धेने व भक्तीने आम्ही त्याला भजत असूनही (तो मात्र) आम्हांला दुःखसागरांत लोटून देत आहे.८. सिद्धमुनी म्हणतात, अन्य कोणा ब्रह्मादिकांचा रोष झाला असतां हा त्रयमूर्ति सद्‌गुरू आपल्या भक्तांचे रक्षण करण्यास समर्थ आहे. परंतु ह्यांचाच नव्हे तर अगदी लौकिक गुरूंचाही रोष झाला तर कुणीच रक्षण करूं शकत नाही. मला वाटते तू ह्या सद्‌गुरूंच्या कृपेला पात्र नसावास.९. हा आत्मा स्थूलदेहरूप आहे, की सूक्ष्मदेहरूप अथवा ह्या दोन्हीहून वेगळा? वेगळा असेल तर अणूच्या आकाराचा आहे की मध्यम आकाराचा आहे की सर्वगत आहे? जड आहे, द्रव्यबोधात्मक आहे की चिद्रूप आहे? हा ईश्वरच आहे की ईश्वराहून भिन्न आहे? प्रपंच सत्य आहे की मिथ्या? मोक्षाचे साधन कर्म आहे, की योग आहे की ज्ञान आहे? अशा बुद्धिजन्य, संसर्गजन्य आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनाने उत्पन्न झालेले संशय ज्याच्या चित्तांत घर करून राहिलेले आहेत. त्यांतही वेदांतवाक्यावर श्रद्धा नसलेल्या संशयग्रस्त पुरुषाचे रक्षण कुणीही कुठेही करूं शकणार नाही. त्रिमूर्त्यात्मक सद्‌गुरूंनी टाकलेल्या ह्या संशयात्म्यावर कोण अनुग्रह करील? अर्थात् कुणीच नाही.१०.

**॥ नामधारक उवाच ॥**

**रुष्टेऽपि लौकिके नेशःकोऽपीत्युक्तं वदस्व चेत् । प्राग्वृत्तं चैष त्र्य्यात्मा कथं मे छिन्धि संशयम् ॥११॥**

**॥ सिद्ध उवाच ॥**

**पुरा निराशिषोऽप्येको बहुस्यामित्यभून्मतिः । या योगनिद्रितस्यैषा विष्णोर्मायाऽनया जगत् ॥१२॥**
**सृष्टं प्राङ्नाभिकमलादभवच्चतुराननः । ददौ तस्मै विनीताय वेदांस्तैरसृजज्जगत् ॥१३॥**

नामधारक उवाच। लौकिके अपि रुष्टे न कः अपि ईशः इति उक्तम्। प्राक्+वृत्तं चेत् वदस्व। कथं त्रयि+आत्मा च। संशयं छिन्धि।११। सिद्ध उवाच। पुरा निः+आशिषः एकः अपि योग+निद्रितस्य विष्णोः या मतिः अभूत् एषा माया। अनया जगत् सृष्टम्। प्राक् नाभि+कमलात् चतुः+आननः अभवत्। तस्मै विनीताय (विष्णुः) वेदान् ददौ। (सः) तैः जगत् असृजत्।१२-१३।

नामधारक विचारतो. महाराज! 'लौकिक गुरूचाही जर रोष झाला तरीही त्यापासून सोडवणारा कुणी नाही' असे जे आपण बोललांत त्याचा कांही पूर्वेतिहास असला तर सांगावा. तसेच हा दत्त त्रयमूर्ति कसा आहे हा माझा संशयही आपण फेडावा.११. सिद्धमुनी उत्तर देतात. पूर्वी - म्हणजे नैमित्तिक कल्पाच्या काळी, निरिच्छ अशा परमात्म्याला आपण एकच आहो ते बहुरूप व्हावे अशी बुद्धी झाली. ते का? या प्रश्नाचे उत्तर देतात की नैमित्तिक प्रलयाच्या वेळी सर्व प्रणिमात्रांच्या वासना परमेश्वराच्या ठायीं लीन झाल्या तीच योगनिद्रा. ह्या योगनिद्रा धारण केलेल्या व्यापनशील परमात्म्याला त्या सर्व प्राणिमात्रांच्या फलोन्मुख झालेल्या कर्मांमुळे आपण अनेक रूपे घ्यावीत अशी मतिरूप इच्छा झाली (ऋग्वेद १०:१२९:३-४). इच्छा, ज्ञान आणि क्रिया शक्तिरूप अशा ह्या विष्णूची ही मिथ्यारूप असली तरीही कार्यावरून तिचे अनुमान करतां येते. अशा मिथ्या असूनही भावरूप (सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय) म्हणविलेली माया भगवंताच्या दृष्टिमात्राने उद्दीपित झाली आणि ती सचेतन झाल्यासारखी भासली. तिच्या द्वारे जगताची उत्पत्ति केली. (पुढच्या श्लोकांतील **सृष्टं** हा शब्द जोडून.) वास्तविक उत्पत्ति-स्थिति-लय ही मायेची कार्ये असूनही विष्णुस्वरूप ब्रह्माला कल्पनेने दिलेले कारणत्व आहे. *'जन्माद्यस्य यतोऽन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (१:१:२) हे ब्रह्माचे तटस्थलक्षण आहे.११.

**कृतं त्रेतां द्वापरं च सधर्मं व्यसृजत्कलिम् । वर्णाश्रमविभागेन मनुष्यस्थितिहेतवे ।।१४।।**
**वैराग्यज्ञानवान्सत्यः सत्यवाग्यज्ञसूत्रभृत् । यज्ञसंभारधृक्त्रेता द्वापरस्तु सुशस्त्रभृत् ।।१५।।**
**पुण्यपापोग्रताशान्ति-दयानैष्ठुर्यसंयुतः । कलिस्तु लिङ्गजिह्वाभृत्कच्चरोऽसन्पिशाचवत् ।।१६।।**

(सः) मनुष्य+स्थिति+हेतवे वर्ण+आश्रम+विभागेन कृतं, त्रेतां, द्वापरं च कलिं स+धर्मं व्यसृजत्।१४। सत्यः वैराग्य+ज्ञानवान् सत्य+वाक् यज्ञ+सूत्र+भृत्। त्रेता यज्ञ+संभार+धृक्, द्वापरः तु सु+शस्त्र+भृत् पुण्य+पाप+उग्रता+शान्ति+दया+नैष्ठुर्य+संयुतः। कलिः तु लिङ्ग+जिह्वा+भृत् कच्चरः असन् पिशाचवत्।१५-१६।

मग सृष्टीची प्रक्रिया सांगतात. प्रथम (श्रीविष्णूंच्या) नाभिकमलांतून चतुर्मुख ब्रह्मदेवांचा उद्‌भव झाला. विनीत अशा त्या ब्रह्मदेवाला (भगवंतांनी) वेद दिले. (ब्रह्मदेवांनी) त्या वेदांच्या आधारे *'धाता यथापूर्वमकल्पयत्'* या श्रुतिवचनानुसार (ऋग्वेद १०:१९०:३) जगताची निर्मिति केली. भगवंतांनी त्याला वेद दिले यावरून हे स्पष्ट होते की *'शास्त्रयोनित्वात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:१:३) प्रतिपादिल्याप्रमाणे अनादि विष्णूच वेदांचे कर्ते आहेत. इतर कुणी अर्वाचीन नव्हेत.१२. वैराग्य, ध्यान इत्यादि धर्मांनी युक्त कृतयुग, यजनादिधर्मांनी युक्त त्रेतायुग, अर्चनादि धर्माने युक्त द्वापार आणि कीर्तनधर्माने युक्त कलि अशा चार युगांची उत्पत्ती करून मानवाच्या उत्कर्षासाठी ब्राह्मण, क्षत्रिय, वैय आणि शूद्र अशा चार वर्णांची तसेच ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांची विभागणी केली.१४. सत्य(कृत)युग वैराग्य आणि ज्ञान यांनी युक्त, सत्यभाषी आणि यज्ञोपवीत धारण करणारे आहे. म्हणजेच त्या युगांतील प्रजेत हे गुण होते. त्याचप्रमाणे त्रेतायुग यज्ञसामग्री धारण करणारे तर द्वापारयुग शस्त्रास्त्रांनी सज्ज असे केले.१५. (कृतयुगांत चतुष्पाद असलेल्या धर्माचा) एक एक पाद त्रेतादि युगांत क्रमाने कमी होऊन द्वापारांत द्विपाद झाल्याने पाप व पुण्य, उग्रता व शांती तसेच दया व निष्ठुरता यांचे मिश्रण असते. तर कलियुगांत धर्माचा एकच पाय राहतो. **'तु'** शब्दाने कलियुगाचे वेगळेपण सूचित केले आहे. त्याने एका हाताने जिह्वा आणि दुसऱ्या हाताने लिंग धरले आहे. म्हणजेच या युगांतील लोक जिभेचे चोचले पुरविणारे आणि कामपर असतील. कलियुग मळकट, असाधु आणि पिशाचासारखे वेडेवांकडे चाळे करणारे आहे.१६.

**एकैकं यतकालं कौ प्रेरयद्विश्वहेतवे । प्रयाणकाले कलये प्रोक्तां गुरुकथां शृणु ।।१७।।**

**।। कलिरुवाच ।।**

**कथं यास्ये वृषपर-प्रशान्तजनसेविताम् । भुवं श्रुत्वापि मे चेतः खिद्यतेऽङ्गं च तप्यते ।।१८।।**
**छेत्ताहं धर्मसेतोः शुक्कलहद्वेषतापकृत्। भ्रातान्यस्त्रीस्वहर्ता मे षड्-द्विड्भाक्प्राणवल्लभः ।।१९।।**
**क्षतव्रतोऽपि मे प्राणो नास्तिकोऽधार्मिकोऽपि मे । ये स्थिता भारते वर्षे धार्मिकास्ते ममारयः ।।२०।।**

कलिः उवाच। वृषपर+प्रशांत+जन+सेवितां भुवं कथं यास्ये? श्रुत्वा अपि मे चेतः खिद्यते, अङ्गं च तप्यते।१८। अहं धर्म+सेतोः छेत्ता, शुक्+कलह+द्वेष+ताप+कृत्। भ्राता+अन्य+स्त्री+हर्ता षड्+द्विड्+भाक् मे प्राण+वल्लभः।१९। क्षत+व्रतः अपि मे प्राणः, नास्तिकः अधार्मिकः अपि। ये भारते वर्षे स्थिताः धार्मिकाः ते मम अरयः।२०।

प्रत्येक युगाला त्याचा कालावधि नेमून जगताच्या स्थैर्यासाठी भूमीवर पाठविले. कृताचा कालावधि सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षे, त्रेतायुगाचा बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षे, द्वापाराचा आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षे तर कलीचा चार लक्ष बत्तीस हजार वर्षे असा आहे. कलियुगाला (भूमीवर) पाठवितांना (ब्रह्मदेवाने) सांगितलेली गुरुकथा तूं ऐक.१७. ब्रह्मदेवाने पृथ्वीवर जाण्याची आज्ञा केल्यावर धर्माला घाबरून कली म्हणतो, 'धर्मपर प्रशांत असे लोक ज्या भूमीवर राहतात तिथे मी कसा जाऊं? त्या भूमीची वार्ता ऐकूनसुद्धा माझे मन खिन्न होते आणि माझ्या अंगाचा दाह होतो.'१८. 'मी धर्ममर्यादेचा उच्छेद करणारा आहे. शोक, कलह, द्वेष आणि ताप करणारा आहे. परधन व परस्त्री यांचा अपहार करणारे मला भावासारखे प्रिय आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांचे दास माझे प्राणसखे आहेत.'१९. 'व्रत, नेम सोडून देणारे, नास्तिक (परलोक नाहीच असे मानणारे) आणि अधर्मरत (धर्मविरुद्ध आचरण करणारे) जणूं माझे प्राणच आहेत. भारतवर्षांत राहणारे धार्मिक माझे वैरी आहेतच कारण त्यांचा मला ताप होतो.'२०.

**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरेक्षणात् । बहिर्यान्त्यसवो मेऽपि योगिज्ञानीक्षणात्क्षणात् ।।२१।।**

**।। ब्रह्मोवाच ।।**

**आसुर्या संपदा गच्छ वशा लोका भवन्ति ते । शतायुर्हि नरः कोऽपि धन्यो भूयान्न तं जहि ।।२२।।**
**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरो नरः । त्वद्दोषैर्लिप्यते नैव गुरुभक्तो विशेषतः ।।२३।।**
**नाम्बुनाब्जदलं यद्वल्लिप्यतेऽघैर्गुरुप्रियः । नैव जेतुं गुरोर्भक्तं देवा अपि न शक्नुयुः ।।२४।।**

गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपर ईक्षणात्, योगि+ज्ञानी+ईक्षणात् क्षणात् मे असवः बहिः यान्ति।२१। ब्रह्मा उवाच। आसुर्या संपदा गच्छ, लोकाः ते वशाः भवन्ति। नरः शत+आयुः। कः अपि धन्यः भूयात्। तं न जहि।२२। गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपरः नरः त्वत्+दोषैः न लिप्यते। विशेषतः गुरु+भक्तः न एव।२३। यत्+वत् अम्बुना अब्ज+दलं अघैः गुरु+प्रियः न लिप्यते। देवाः अपि गुरुभक्तं जेतुं न शक्नुयुः।२४।

'गुरु, ईश्वर, सात्त्विक ब्राह्मण आणि मातापितरांची सेवा करणाऱ्यांना (केवळ) पाहिल्यानेही माझे प्राण कंठाशी येतात. तसेच योगी, ज्ञानी यांच्या दर्शनाने मी क्षणांत मरायला टेकतो.'२१. ब्रह्मदेव त्याला धीर देतात, 'दंभ, दर्प, अभिमान, क्रोध आणि पारुष्य (कठोर वचन) ही आसुरी संपदा (भ.गी.१६:४) तुझ्याबरोबर पाठवीत आहे. त्यांना घेऊन जा म्हणजे लोक तुला वश होतील. माणसाचे आयुष्य केवळ शंभर वर्षेच असेल; एखादाच पुण्यवान् होईल. त्याचा घात करू नको.'२२. गुरू, ईश्वर, देव व ब्राह्मण यांची सेवा करणाऱ्यांना, विशेषतः गुरुभक्तांना तुझा दोष कधीच लागणार नाही.'२३. 'ज्याप्रमाणे कमलाच्या पानाला पाणी चिकटत नाही (छांदोग्योपनिषत् ४:१४:३) त्याप्रमाणे श्रीगुरुकृपापात्र शिष्याला पाप स्पर्शूं शकत नाही. गुरूच्या भक्ताला देवादिकसुद्धां जिंकूं शकत नाहीत, त्याला विघ्न करूं शकत नाहीत; मग इतरांची काय कथा?'२४.

॥ कलिरुवाच ॥

**गुरुर्वरोऽमरेभ्योऽपि कथं वद हि यत्प्रियः । केनाप्यजेय इत्येतत्प्राग्वृत्तं क्वापि चेद्वद ॥२५॥**

॥ ब्रह्मोवाच ॥

**ज्ञानं गुरुं विना न स्याद्यस्य कस्यापि निर्जराः । गुरुभक्त्यैव सिद्धार्थाः स्युस्ततोऽप्यधिको गुरुः ॥२६॥**

कलिः उवाच। यत् प्रियः केन अपि अजेयः (सः गुरुः) अमरेभ्यः अपि वरः कथं, वद। इति एतत् क्व अपि प्राक् वृत्तं चेत् वद।२५।
ब्रह्मा उवाच। यस्य कस्य अपि गुरुं विना ज्ञानं न स्यात्। निर्जराः अपि गुरुभक्त्या एव सिद्ध+अर्थाःस्युः। ततः अपि अधिकः गुरुः।२६।

कलि प्रश्न करतो, 'गुरू देवापेक्षांही इतके श्रेष्ठ कसे ज्यायोगे त्यांचे भक्तही अजिंक्य होतात? याविषयी कांही पूर्वेतिहास असल्यास सांगा.'२५. **देवतांना संसार आहे का?** ब्रह्मदेव कलीला सांगतात, 'गुरूशिवाय ज्ञान कुणालाही होत नाही. इंद्र, अश्विनीकुमार आदि देवही प्रजापति, दध्यङ्मुख इत्यादि गुरूंची भक्ती करूनच मोक्ष पावले. त्यामुळे त्यांच्यापेक्षां गुरू अधिक श्रेष्ठ आहेत.' 'स्वर्गस्थ इंद्रादि देवतांना कुठला संसार? आणि संसारच नसेल तर मोक्ष कशापासून?' ह्या शंकेचे समाधान असे आहे की श्रुतिवचनानुसार (ऐतरेय उ. १:२:१) त्या देवताही भूक-तहान इत्यादि स्वरूपाच्या संसारसागरांत पडतात; आणि त्यांतून मुक्त होण्यासाठी गुरूपसत्ति (सद्गुरूंना शरण जाणे) हाच उपाय सांगितला आहे. *'आचार्यवान् पुरुषो वेद'* (छां.उ. ६:१४:२) *'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ'* (कठ उ. १:२:९). तर मग मनुष्यांना तर यज्ञादि कर्माच्या अनुष्ठानाने चित्तशुद्धि होऊन मग मोक्ष मिळतो. देवांनी कर्मांद्वारे कुणाचे अनुष्ठान करायचे? मग चित्तशुद्धी कशी होईल? असे म्हणाल तर देवांना स्वभावतःच वेदांचे ज्ञान असल्याने मनुष्याप्रमाणे वेदाध्ययनासाठी उपनयनादि संस्कारांची त्यांना आवश्यकता नाही. तसेच त्यांचे अंतःकरण स्वभावतः शुद्ध असल्याने त्यांना यज्ञादि कर्मांचीही आवश्यकता नाही. ज्यांचे (मानवांचे) चित्त अशुद्ध असते त्यांना चित्तशुद्धी होऊन विविदिषा (वैराग्य) उत्पन्न होण्यासाठी कर्मकांडाद्वारे देवतांचे यजन करण्याची आवश्यकता असते.

**पुरा गोदावरीतीरे वेदधर्मैकदा मुनिः । बहुशिष्यप्रशिष्यस्तन्निष्ठां ज्ञातुमिदं जगौ ।।२७।।**
**तपसा क्षालितं पापं बहु प्रारब्धमस्ति मे । तद्भोग्यं व्याधिरूपेण काश्यां कस्तत्र रक्षकः ।।२८।।**

पुरा गोदावरी+तीरे एकदा वेदर्धमा बहु+शिष्य+प्रशिष्यः मुनिः तत् निष्ठां ज्ञातुं इदं जगौ।२७। तपसा पापं क्षालितं मे बहु प्रारब्धं अस्ति। ते व्याधि+रूपेण काश्यां भोग्यम्। तत्र कः रक्षकः अस्ति?२८।

*'तदुपरि बादरायणः संभवात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:३:२६) सांगितले आहे की मनुष्याच्या वर असणाऱ्या स्वर्गादिक लोकांतील देवतांनाही ज्ञानाचा अधिकार आहे असे बादरायणांचे मत आहे. उदाहरणार्थ, इंद्राने ब्रह्मचर्य धारण करून चार वेळां प्रजापतीला गुरू करून ज्ञान प्राप्त केले. तसेच अश्विनीकुमारांनी दध्यंचांना गुरू करून मधुब्राह्मण विद्या मिळविली. त्यावरून देवही गुरूची उपासना करून कृतार्थ झाले. अशा रीतीने गुरू त्यांच्याहून श्रेष्ठ आहेत.२६.

**प्रारब्ध भोगानेच संपवावे -** इथे एक पूर्वीचा इतिहास सांगतात. पूर्वी गोदावरीतीरावर वेदधर्मा मुनि रहात. त्यांना खूपसे शिष्य आणि प्रशिष्य होते. एकदा त्यांची श्रद्धा जाणण्यासाठी (त्यांच्या श्रद्धेची परीक्षा घेण्यासाठी) वेदधर्मा त्यांना म्हणाले.२७. 'धर्माने पापाचा नाश होतो' (महानारायणोपनिषत् १६:६), 'तपाने पापाचा नाश करतात' (मनुस्मृति १२:१०४) ह्या वचनांनुसार मी तपाने बरेच पाप धुवून टाकले आहे. तरी अजूनही माझे प्रारब्ध उरलेले आहे. ते व्याधिरूपाने मला काशीक्षेत्रांत राहून भोगायचे आहे. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो. ते पापरूप कर्म विविध आधी ज्यांत अंतर्भूत आहेत अशा व्याधीद्वारा मला भोगावे लागेल. किंवा (मुनींच्या मनोभूमिकेच्या संदर्भांत) असाही अर्थ करतां येईल की शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी असा दुःखद कर्मभोग आधीरहित (विवेकाने अनुद्विग्न मनाने) भोगायचा. त्या काशीत तुमच्यापैकी कोण माझे रक्षण करील?२८.

**गलत्कुष्ठाभिभूतस्य मम दंशादिवारणैः । क्षालनैरन्नदानैश्च प्रेम्णा कस्तत्र रक्षकः ।।२९।।**
**इति तस्य वचः श्रुत्वा तूष्णीं तस्थुर्भियाखिलाः । तत्रैको दीपको नाम शिष्य ऊचेऽभिवाद्य तम् ।।३०।।**
**न शेषयेद्दोषशेषं मोक्षविघ्नं भवत्कृतम् । ममात्मनैव भोक्ष्येऽहमनुज्ञां दातुमर्हसि ।।३१।।**

**।। गुरुरुवाच ।।**

**भोक्तव्यं स्वयमेवाघं नान्यद्वारेण तत्क्षयः । अतः कष्टेन तद्भोक्ष्ये काश्यां शक्तोऽसि चेदव ।।३२।।**

गलत्+कुष्ठ+अभिभूतस्य मम प्रेम्णा दंश+आदि+वारणैः, क्षालनैः अन्न+दानैः च कः तत्र रक्षकः?।२९। इति तस्य वचः श्रुत्वा अखिलाः भिया तूष्णीं तस्थुः। तत्र दीपकः नाम एकः शिष्यः तं अभिवाद्य ऊचे।३०। 'भवत्+कृतं मोक्ष+विघ्नं दोष+शेषं न शेषयेत्। अहं मम आत्मना एव भोक्ष्ये। अनुज्ञां दातुं अर्हसि'।३१। गुरुः उवाच। अघं स्वयं एव भोक्तव्यम्। अन्य+द्वारेण तत् क्षयः न। अतः तत् कष्टेन काश्यां भोक्ष्ये। (त्वं) शक्तः असि चेत् अव।३२।

तुम्ही सगळेच 'आम्ही करू' असे म्हणाल तर (नीट लक्ष देऊन) ऐका. पू आणि रक्त वाहणाऱ्या कुष्ठाच्या व्रणांनी व्यापलेल्या माझा माशा आणि किडांना निवारून, धुवून, मला अन्न भरवून, प्रेमपूर्वक तिथे माझा सांभाळ कोण करील?२९. हे त्यांचे बोलणे ऐकून सर्वजण भीतीने गप्प राहिले. एवढी अवघड जोखीम पत्करतां येत नाही आणि नाही म्हणावे तर गुरूंचा शाप होईल. तिथे एक दीपक नांवाचा शिष्य त्यांना (गुरूंना) वंदन करून म्हणाला.३०. 'दोषाचा अंशही बाकी ठेवूं नये कारण तो मोक्षाला विघ्न करतो. आपले दुष्कृत मी माझ्या देहानेच भोगून टाकतो. आपण मला आज्ञा करावी.'३१. गुरु म्हणतात 'आपले पाप आपणच भोगावे. दुसऱ्याकरवी त्याचा क्षय होत नाही. गरुडपुराणांत म्हटले आहे, 'जीव एकटाच जन्माला येते आणि एकटाच मरण पावतो. एकटाच पुण्याचा भोग घेतो आणि एकट्यानेच पापही भोगावे लागते.' (प्रेतकल्पखंड, धर्मकांड १२:२३-२४). त्यासाठी मी हे कर्म कष्टाने काशीत भोगणार आहे. तुझी शक्ती असेल तर मला सांभाळ.'३२.

**इत्युक्तं गुरुणाश्रुत्य काशीं तेन समं ययौ । कुष्ठी भूत्वापि सोऽन्धोऽघं बुभुजे भेज एष तम् ।।३३।।**
**गुरुर्गलद्व्रणत्रस्तः कार्याकार्याज्ञ एव सन् । प्रतीपाचरणैः शिष्यं शश्वद्व्यर्थं व्यताडयत् ।।३४।।**
**स सेवावसरे भिक्षां सेवां भिक्षाक्षणेऽपि तम् । ययाचेऽहनदप्राप्तौ नाखिद्यत सदाप्यसौ ।।३५।।**
**दत्तां याचितकां भिक्षां मुनिस्तद्दोषकीर्तनात् । भूमौ प्रक्षिप्य रुष्टोऽन्नं स्वाद्वानीहीत्युवाच तम् ।।३६।।**

इति गुरुणा उक्तं आश्रुत्य (दीपकः) तेन समं काशीं ययौ। सः अपि कुष्ठी अंधः भूत्वा अघं बुभुजे। एष तम् भेजे।३३। गुरुः गलत्+व्रण+त्रस्तः कार्य+अकार्य+अज्ञ एव सन् प्रतीप+आचरणैः शिष्यं व्यर्थं व्यताडयत्।३४। सः तं सेवा+अवसरे भिक्षां भिक्षा+क्षणे सेवां अपि ययाचे। अप्राप्तौ अहनत्। असौ सदा अपि न अखिद्यत।३५। मुनिः याचितकां भिक्षां दत्तां तत् दोष+कीर्तनात् भूमौ प्रक्षिप्य रुष्टः 'वादु अन्नं आनीहि' इति तं उवाच।३६।

हे गुरूंचे वचन अंगीकारून (दीपक) त्यांच्यासह काशीला गेला. *'या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरेतसां। सा गतिः सर्वजन्तूनां गौतमीतीरवासिनां।। रेवातीरे तपः कुर्यान्मरणं जाह्नवीतटे। दानं दद्यात्कुरुक्षेत्रे तत्त्रयं गौतमीतटे।।'* (गौतमीमाहात्म्य) असे गोदावरीचे माहात्म्य असले तरी काशीक्षेत्राचा प्रभाव दर्शविण्यासाठी वेदधर्मा मुनि गोदावरीपासून काशीला गेले. तसेच कुष्ठादि रोगांचा स्वीकार केला. पुढे ५९व्या श्लोकांत हे स्पष्ट केले आहे. अशा रीतीने भोग भोगणाऱ्या आंधळ्या किंवा कुष्ठी गुरूची तो शिष्य सेवा करूं लागला.३३. वाहत्या व्रणांनी त्रासलेल्या गुरूंना योग्य अयोग्याचा विवेक राहिला नाही; आणि ते वेडेवाकडे वागून शिष्याला विनाकरणच मारूही लागले.३४. ते भिक्षेच्या वेळी सेवेची आणि सेवेच्या वेळी भिक्षेची मागणी करीत. लगेच न मिळाल्यास त्याला (शिष्याला) मारीत. तरीही तो खिन्न होत नसे. (प्रसन्नचित्ताने सेवा करीत असे.)३५. मागून आणलेली भिक्षा खातानाही, '(ते अन्न) थंड आहे, रुचकर नाही' अशी नावे ठेवीत रागाने जमिनीवर टाकून त्याला गोड अन्न आणायला सांगत.३६.

**भिक्षार्थमपि गच्छन्तं निवर्त्योचे कृता न मे । विण्मूत्रोत्सर्गसंशुद्धिः क्व यास्यश्नन्ति मक्षिकाः ।।३७।।**
**यथोक्तं कर्तुमुद्युक्तं निवार्योचे न वेत्सि माम् । क्षुधा कण्ठगतप्राणं देह्यन्नं पाप मे द्रुतम् ।।३८।।**
**भुक्त्वा याचितकान्नं स कदाचित्तात पुत्रक । श्रान्तोऽसि मे स्वपेत्युक्त्वा सुप्तेऽस्मिन्क्षुधितोऽब्रवीत् ।।३९।।**

भिक्षार्थं गच्छन्तं अपि निवर्त्य ऊचे, 'क्व यास्यसि? मे विट्+मूत्र+उत्सर्ग+संशुद्धिः न कृता। मक्षिकाः अश्नन्ति'।३७। यथा उक्तं कर्तुं उद्युक्तं निवार्य ऊचे, 'मां क्षुधा कण्ठ+गत+प्राणं न वेत्सि? पाप! द्रुतं मे अन्नं देहि'।३८। कदाचित् याचितक+अन्नं भुक्त्वा सः '(हे) तात, पुत्रक, श्रान्तः असि, स्वप,' इति उक्त्वा अस्मिन् सुप्ते 'क्षुधितः' अब्रवीत्।३९।

भिक्षेसाठी निघालेल्या शिष्याला थांबवून 'अरे! कुठे जातोस? माझ्या विष्ठा-मूत्रविसर्जनाची (तसेच जखमांतून वाहणाऱ्या पू, रक्त यांची) स्वच्छता केली नाहीस. या माशा मला चावताहेत,' असे बोलत.३७. त्यांच्या सांगण्यानुसार करायला गेल्यास 'अरे पाप्या! भुकेने माझे प्राण गळ्याशी आलेले तुला कळत नाहीत का? मला लवकर अन्न दे,' असे म्हणून त्याला अडवत. *'अन्नायुर्वा एष यद्वायुः'* या वचनानुसार (ऐ.उ. १:३:१०) अन्न हे प्राणाला शरीराशी जोडणारे बंधन असल्याने जीवनाचे कारण आहे. यासाठीच वाजसनेयांनी अन्नाला प्राणाला बांधून ठेवणारी दोरी (दाम) (बृ.उ. २:२:१) असा विचार मांडून अन्नाच्या अभावाने प्राण देठापासून वेगळ्या झालेल्या फळासारखा शरीरांतून सुटून जातो असे म्हटले आहे (बृ.उ. ४:३:३६). त्यानुसार वेदधर्मा 'मला अगतिकाला जर भुकेने मरण आले तर ती हत्या तुला लागेल.' म्हणून त्याला 'पाप्या!' असे संबोधन केले आहे.३८. कधी कधी शिष्याने मागून अणलेले अन्न खाऊन गुरूंनी म्हणावे, 'बाबा रे! माझं करून थकला असशील बाळा! झोप.' त्यावर तो शिष्य झोपतो न झोपतो तोंच 'अरे मला भूक लागलीय्,' असे म्हणावे. शिष्याला तात म्हटले आहे. 'तनोति' म्हणजे वंश वाढवतो तो 'तात'. शिष्य स्वतःच्या शिष्यप्रशिष्यांद्वारे गुरुपरंपरेचा विस्तार करतो. या अर्थाने हे संबोधन यथार्थच आहे.३९.

**एवं संछलितोप्येष भेजेऽखेदोऽनिशं गुरुम् । विस्मृतस्वात्मयात्रोऽपि मत्त्वा सर्वामरेश्वरम् ।।४०।।**
**गाङ्गाम्भो गुरुपादाम्भः साक्षाद्विश्वेश्वरं गुरुम् । सर्वानन्दनिधिं बुद्ध्वा मनो न क्वाप्यचोदयत् ।।४१।।**
**गुरुभक्तिसुपूतोऽभूज्ज्ञात्वा विश्वेश्वरोऽप्यमुम् । प्राप्योचे वरदोऽस्मीष्टं वरं वरय तेऽस्तु शम् ।।४२।।**
**दीपकोऽप्याह किं कार्यं वरेण गुरवस्तु मे । रुक्शान्त्यै वरमिच्छन्ति यदि पृष्ट्वा वृणोमि तत् ।।४३।।**

एवं संछलितः अपि एष अखेदः अनिशं विस्मृत+स्व+आत्म+यात्रः अपि गुरुं सर्व+अमर+ईश्वरं मत्वा भेजे।४०। गुरु+पाद+अम्भः गाङ्ग+अम्भः, गुरुं साक्षात् विश्वेश्वरं सर्व+आनन्द+निधिं बुद्ध्वा मनः क्व अपि न चोदयत्।४१। विश्वेश्वरः अपि अमुं गुरु+भक्ति+सुपूतः अभूत् ज्ञात्वा प्राप्य ऊचे, 'वरदः अस्मि। वरं वरय। ते शं अस्तु!'।४२। दीपकः अपि आह। वरेण मे किं कार्यम्? यदि गुरवः रुक्+शान्त्यै वरं इच्छन्ति (तं) पृष्ट्वा तत् वृणोमि।४३।

अशा रीतीने छळ करूनही हा शिष्य मात्र रात्रंदिवस न कंटाळता गुरूंनाच सर्वदेवेश्वर मानून त्यांची सेवा आपल्या देहाची पर्वा न करतां करीत होता.४०. गुरूच साक्षात् विश्वेश्वर आहेत, गुरूंचे चरणतीर्थ हेच गंगाजल आणि गुरूच सर्व सुखाचे आगर आहेत असे जाणून (त्या शिष्याने) आपले मन इतर कोणत्याही देवतांकडे जाऊं दिले नाही. इतर कुठल्याही दैवताच्या दर्शनादीचा संकल्पही मनांत येऊं दिला नाही.४१. हा दीपक गुरुभक्तीच्या योगाने अत्यंत पवित्र (शुद्धचित्त) झाला आहे असे जाणून भगवान् विश्वेश्वर त्याच्याकडे येऊन म्हणाले, 'मी (प्रसन्न होऊन) वर देत आहे. तू वर मागून घे. तुझे कल्याण असो.' दुःखाचा क्षय करणारे (*'श्यति'*) ते 'शं' म्हणजे कल्याण.४२. दीपक म्हणाला 'मला वर काय करायचा? माझ्या गुरूंना रोगाच्या शमनासाठी वर हवा असल्यास त्यांना (ते सध्यां इथेच असल्याने) विचारतो. त्यांची इच्छा असेल तर तो वर मी घेईन.'४३.

**इत्युक्त्वैत्य शशंसास्मै गुरुस्तप्तोऽब्रवीत्स तम् । भोगादेव क्षयं नेष्ये सेवायां मे बिभेष्यपि ।।४४।।**
**तच्छ्रुत्वा स तथेत्युक्त्वा शिवमेत्याब्रवीद्वरम् । न गुर्वसंमतं काङ्क्षे तच्छ्रुत्वागात्स दुर्मनाः ।।४५।।**
**निर्वाणमण्डपं गत्वा प्राह विष्णुमुखामरान् । चण्डो मुनिर्वेदधर्मा रुग्णस्तच्छिष्य उत्तमः ।।४६।।**
**गुरुभक्तः कम्बलाश्वतरासन्नोऽस्ति दीपकः । वरं दातुमगां प्रेम्णा नाददे स गुरूद्यतः ।।४७।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तं द्रष्टुकामो हरिर्ययौ । विष्णुर्दीपकमाहाङ्ग वरदोऽस्मि वरं वृणु ।।४८।।**

इति उक्त्वा अस्मै एत्य शशंस। गुरुः तप्तः, तं अब्रवीत्। भोगात् एव क्षयं नेष्ये। मे सेवायां बिभेषि अपि?।४४। तत् श्रुत्वा स 'तथा' इति उक्त्वा शिवं एत्य अब्रवीत्, 'गुरु+असंमतं वरं न काङ्क्षे'। तत् श्रुत्वा सः दुर्मनाः अगात्।४५। निर्वाण+मण्डपं गत्वा विष्णु+मुखान् अमरान् प्राह। चण्डः रुग्णः मुनिः वेदधर्मा तत् शिष्यः कम्बल+अश्वतर+आसन्नः दीपकः अस्ति। प्रेम्णा वरं दातुं अगात्। सः गुरु+उद्यतः न आददे।४७। इति ईश+वाक्यं श्रुत्वा हरिः तं द्रष्टुकामः ययौ। विष्णुः दीपकं आह, '(हे) अङ्ग, वरदः अस्मि, वरं वृणु।४८।

असे (विश्वेश्वरांना) बोलून (दीपकाने) गुरूंकडे येऊन त्यांना हे वृत्त सांगितले. (आपल्या रोगनिवारणासाठी वर मागून घेऊं का असे विचारले.) तेव्हां गुरू संतापून म्हणाले, 'माझे प्रारब्धकर्म मी भोगूनच संपवीन. माझ्या सेवेला भितोस (उबगलास) काय?'.४४. ते (सदगुरूंचे वचन) ऐकून 'तसे (ईश्वराला सांगतो)' असे म्हणून शंकरांकडे येऊन 'गुरूंना मान्य नसलेला (आपला) वर मला नको' असे सांगितले. हे ऐकून आपल्या वराच्या अनादराने हिरमुसलेले ते भगवान शंकर निघून गेले.४५. निर्वाणमंडपांत येऊन शंकरांनी विष्णुप्रमुख सर्व देवांना सांगितले की, 'वेदधर्मा नांवाचा अत्यंत कोपी मुनि व्याधिग्रस्त झाला आहे. त्याचा उत्तम शिष्य-.४६. गुरुभक्त दीपक कंबलाश्वतराजवळ गुरूंची सेवा करीत आहे. त्याला (त्याच्या तीव्र गुरुभक्तीने) प्रसन्न होऊन वर देण्यासाठी मी गेलो असतां तो गुरूंच्या सेवेत निमग्न असलेला शिष्य वर घेत नाही.'४७. हे ईश्वराचे वाक्य ऐकून श्रीहरि विष्णु दीपकाकडे जाऊन म्हणाले, 'प्रिय दीपका, मी वर द्यायला आलो आहे. तू वर मागून घे.'४८.

**तपसाष्टाङ्गयोगैश्च सूपायैर्मननादिभिः । उपवासैर्व्रतैर्योगैर्धर्मैर्गम्योऽस्मि नो नृणाम् ।।४९।।**
**गुरुसद्विप्रभक्तस्य मन्मयाभ्यन्तरात्मनः । निर्द्वन्द्वस्याऽपि साध्व्याश्च विष्णुर्दृश्योऽस्मि सर्वदा ।।५०।।**
**तस्मात्कष्टेन सुभग सद्गुरुः सेवितस्त्वया । तेनैव परितुष्टोऽस्मि वरं वरय मत्प्रिय ।।५१।।**

**।। दीपक उवाच ।।**

**श्रीसद्गुरुर्देवदेवो यतो ज्ञानं ततोऽमृतम् । अतोऽधिकं किमस्माकं भवन्ति त्वादृशा वशाः ।।५२।।**

तप+साष्टाङ्ग+योगैः मननादिभिः सु+उपायैः उपवासैः व्रतैः योगैः धर्मैः (अहं) नृणां गम्यः अस्मि नो।४९। गुरु+सत्+विप्र+भक्तस्य मत्+मय+अभ्यन्तर+आत्मनः निर्दन्द्वस्य साध्व्याः च (अहं) विष्णुः सर्वदा दृश्यः अस्मि।५०। तस्मात् (हे) सुभग, त्वया कष्टेन सद्गुरुः सेवितः, तेन एव परितुष्टः अस्मि। (हे) मत्प्रिय, वरं वरय।'।५१। दीपक उवाच। 'श्रीसद्गुरुः देवदेवः यतः ज्ञानम्। ततः अमृतम्। अस्माकं अतः अधिकं किम्? त्वादृशाः वशाः भवन्ति'।५२।

'कृच्छ्रादि तपाने, अष्टांग योग अथवा मननादि सुगम उपायांनी, उपवासानी, व्रतांनी, विविध योगांनी तसेच धर्माचरणानेही मानवांना मी अप्राप्य आहे.'४९. '(मात्र) गुरू, संत, ब्राह्मण यांची भक्ती करणाऱ्या (सुखदुःखादि) द्वंद्वातीत, माझ्याशी एकरूप झालेल्या भक्तांना आणि पतिव्रता स्त्रियांना मी सदैव दृश्य असतो.'५०. 'हे भाग्यवंता, (आमच्या दर्शनानंतर कुणी भाग्यहीन असूं शकतच नाही हे सुचविण्यासाठी) मोठ्या कष्टांनी तू सद्‌गुरूंची सेवा केली आहेस. त्यानेच मी परम प्रसन्न झालो आहे. माझ्या प्रिय भक्ता, वर मागून घे.'५१. दीपक म्हणाला, 'श्री म्हणजे ऐश्वर्याने युक्त असा हा सद्‌गुरू देवांचाही देव आहे.' यांतून 'आपणही रामकृष्णादि अवतारांमध्ये गुरुभक्तिरसाचा आस्वाद घेतला आहेच कीं!' असे जणू दीपक भगवान विष्णूंना सुचवीत आहे. 'कारण या गुरूंपासून ज्ञान आणि त्या ज्ञानापासूनच मोक्ष. अर्थात्‌च ह्या सद्‌गुरूंपेक्षा अधिक असे आम्हांला काय आहे? अर्थात्‌च कांही नाही. (त्यांच्या कृपेनेच) आपणांसारखेही आमच्या अधीन होतात. 'ब्रह्मज्ञानी पुरुषाला (त्याचे अंगभूतच असलेले) सर्व देव बली - इष्टार्थ अर्पण करतात' असे वेदवचन आहे. (तै.उ. १:५:३). एवढा श्रीगुरूंचा महिमा आहे.'५२.

**चेद्विश्वेशो यथा यातस्तथा गन्तुं न रोचते । गुरावेवाचलां भक्तिं देह्यन्यत्र वृणेऽध्रुवम् ।।५३।।**

**।। विष्णुरुवाच ।।**

**श्रद्धाभक्तिः सदा तेस्ति दास्येऽप्यन्यदयाचितम् । दत्ता भुक्तिश्च ते मुक्तिः सत्कीर्तिः स्मर्तृतापहृत् ।।५४।।**
**यः स्तौति सद्गुरुं भक्त्या वेदोपनिषदादिभिः। तुष्टिर्मे तेन दास्यैश्च सान्निध्यं तस्य मे सदा ।।५५।।**

विश्वेशः यथा यातः तथा गन्तुं न रोचते चेत् गुरौ एव अचलां भक्तिं देहि। अन्यत् अध्रुवं न वृणे।५३। विष्णुः उवाच। 'श्रद्धा+भक्तिः ते सदा अस्ति। अन्यत् अपि अयाचितं दास्ये। ते भुक्तिः मुक्तिः स्मर्तृ+ताप+कीर्तिः च दत्ता।५४। यः सद्गुरुं भक्त्या वेद+उपनिषदादिभिः स्तौति तेन, दास्यैः च मे तुष्टिः। तस्य मे सदा सान्निध्यम्।५५।

'परंतु भगवान विश्वेश्वरांसारखेच आपल्यालाही परत पाठविणे मला रुचत नाही. एवढ्यासाठी, आपण मला गुरूंच्या ठायी स्थिर भक्ती द्यावी. याहून दुसरा कोणताही स्त्रीपुत्रादि नाशिवंत वर मी इच्छित नाही. कारण ते ज्ञानाला प्रतिबंधच करतील.' गुरुभक्तीच खऱ्या अर्थाने अविनाशी आहे; कारण श्रुतिवचनानुसार तीच मोक्षपर्यवसायी आहे. श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटले आहे कीं, 'ज्याची ईश्वरावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच (परम भक्ती) गुरूंवर आहे, त्याच्यां(चित्तां)तच हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील.'५३. भगवान विष्णु (अत्यंत प्रसन्नतेने) म्हणतात, 'तुझी (सद्‌गुरूंच्या ठायीं) श्रद्धा व भक्ती निरंतर असेल. आणखीहि तूं न मागितलेले मी देत आहे. तुला सर्व इष्ट भोग दिले. आणि या भोगांमुळे चित्ताचा विक्षेप होऊन मुक्ती दुरावूं नये म्हणून तुला मुक्तीही दिली. विषयांचे सेवन करीत असतांनाही ह्या वरदानाच्या प्रभावाने तू त्यांत आसक्त होणार नाहीस. अर्थात्‌च चित्ताचा विक्षेप होणार नाही आणि मुक्तीचा मार्ग सुकर होईल. मुक्त होऊनसुद्धां भोगांत रमणारा अशी निंदा लोक करतील असे तुला वाटत असल्यास तुझी उत्तम आणि (तुझे) स्मरण करणाऱ्याचे त्रिताप हरण करणारी, कीर्तीही मी देत आहे.'५४. जो सद्गुरूंचे वेद आणि उपनिषदांनी स्तवन करतो त्या स्तवनाने तसेच त्याने केलेल्या सद्गुरूंच्या दास्याने मला संतोष होतो. मी सतत त्याच्या सन्निध असतो.'५५.

**कालादपि भयं नास्ति कुतोन्यस्मात्तु सिद्धयः । स्युस्तद्दास्योऽधिकं नात इत्युक्त्वान्तर्दधे हरिः ।।५६।।**
**शिष्योऽपि गुरवे सर्वं शशंस स तु तत्क्षणम् । प्रीतः सुखाकरकरं दधौ तन्मूर्ध्नि सद्गुरुः ।।५७।।**
**तेन सद्योऽभवच्छिष्यो वेदवेदाङ्गपारगः । कुशलः स्मर्तृतापघ्नो जीवन्मुक्तोऽखिलप्रियः ।।५८।।**
**काशीप्रभावमादेष्टुं शिष्यभावं परीक्षितुम् । वेदधर्माऽभवत्कुष्ठी पापशङ्का कुतो मुनेः ।।५९।।**

'कालात् अपि भयं नास्ति, कुतः अन्यस्मात्?। सिद्धयः तत् दास्यः स्युः। अतः अधिकं न।' इति उक्त्वा हरिः अन्तर्दधे।५६। शिष्यः अपि गुरवे सर्वं शशंस। सः सद्गुरुः तु तत् क्षणं प्रीतः सुख+आकर+करं तत् मूर्ध्नि दधौ।५७। तेन शिष्यः सद्यः वेद+वेदाङ्ग+पारगः कुशलः स्मर्तृ+ताप+घ्नः जीवन् मुक्तः अखिल+प्रियः अभवत्।५८। वेदधर्मा काशी+प्रभावं आदेष्टुं, शिष्य+भावं परीक्षितुं कुष्ठी अभवत्। मुनेः पाप+शङ्का कुतः?।५९।

'सर्वसंहारक काळापासूनसुद्धा त्याला भय नसेल; मग विघ्नादि इतरांची काय कथा? सर्व सिद्धि त्याच्या दासी होतील. ह्यापेक्षा अधिक देण्यासारखे काही राहिले नाही.' असे बोलून श्रीहरि अंतर्धान पावले.५६. शिष्याने गुरूंना हे सर्व निवेदन केले. त्या सद्गुरूंनीही प्रसन्न होऊन तत्क्षणी सुखाची खाण असलेला आपला हात त्या शिष्याच्या मस्तकावर ठेवला. 'ज्ञानप्राप्तीसाठी शिष्याची प्रज्ञाच कारण आहे' असे वसिष्ठ मुनींनी रामाला सांगितले असले (योगवासिष्ठ निर्वाण प्र. पूर्वार्ध ६:१३) तरी '(ज्ञानाला प्रतिबंधक) परिपक्व मलांना नष्ट करण्यासाठी शक्तिपात करून (सद्गुरू शिष्याचा) परम तत्त्वाशी योग करून देतात,' या उक्तीवरून गुरुप्रसादही ज्ञानप्राप्तीचे कारण आहे.५७. त्या शक्तिपाताने शिष्याला तात्काळ वेदवेदांगांचे शाब्द (परोक्ष) ज्ञान तर झालेच पण परब्रह्माचा साक्षात्कारही झाला; आणि तो सर्वांना प्रिय, कुशल, केवळ स्मरणामात्रे ताप नाहीसे करणारा जीवन्मुक्त झाला.५८. काशी क्षेत्राच्या प्रभावाचे प्रबोधन करण्यासाठी तसेच शिष्याच्या भक्तीची परीक्षा घेण्यासाठी वेदधर्मा कुष्ठी झाले. एऱ्हवी मननशील अशा त्यांना पापाची शंकासुद्धा कशी स्पर्शेल?५९.

**इत्याद्या भूरिशो वृत्ताः कले गुरुकथा भुवि । वक्तृश्रोतृमलघ्न्योऽतो भक्तं मा प्रेक्ष गां व्रज ।।६०।।**
**इत्यादिष्टः कलिर्धात्रा भुवमेत्य तथाऽकरोत् । महिमा लौकिकस्यायं किं पुनस्त्र्यात्मसद्गुरोः ।।६१।।**
**तत्सात्विकीं धृतिं लब्ध्वा दृढभक्त्यैव सद्गुरुम् । भजन्ति कृतकृत्यास्ते भवन्ति न ससंशयाः ।।६२।।**
**तस्माद्यदीच्छसि श्रेयः श्रद्धयाऽसंशयं भज । गुरुं नृधाम्ना क्रीडन्तं भवाब्धेः पारमेष्यसि ।।६३।।**

**इति श्रीगुरुचरिते गुरुशिष्यचरितानुकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।२।।**

'(हे) कले, इत्याद्याः भूरिशः वृत्ताः। गुरुकथा भुवि वक्तृ+श्रोतृ+मलघ्न्यः। अतः भक्तं मा प्रेक्ष गां व्रज'।६०। इति धात्रा आदिष्टः कलिः भुवं एत्य तथा अकरोत्। अयं लौकिकस्य (गुरोः) महिमा। किं पुनः त्रि+आत्म+सद्गुरोः?।६१। तत् सात्त्विकीं धृतिः लब्ध्वा दृढ भक्त्या एव सद्गुरुं भजन्ति (ते) कृतकृत्याः भवन्ति। न ससंशयाः।६२। तस्मात् यदि श्रेयं इच्छसि श्रद्धया असंशयं नृ+धाम्ना क्रीडन्तं सद्गुरुं भज। भव+अब्धेः पारं एष्यसि।६३।

(कथा पूर्ण झाल्यावर ब्रह्मदेव म्हणतात) 'हे कले, अशा बऱ्याच घटना भूलोकी झाल्या आहेत. ह्या गुरुकथा वक्त्याच्या आणि श्रोत्याच्या पापांचा नाश करतात. तरी तू गुरुभक्तांकडे पाहू नकोस. हे ध्यानात ठेवून तू पृथ्वीवर जा'.६०. अशा ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणे कलीने पृथ्वीवर येऊन तसेच केले. हा लौकिक सद्‌गुरूंचा महिमा आहे; तर मग त्रयमूर्ति सद्‌गुरूंचा महिमा काय सांगावा?६१. असा हा दृष्टांत सांगून झाल्यावर अर्थांतरन्यासाने तो दृढ करतात. त्यासाठी गीतेत प्रतिपादलेल्या सात्त्विक धृतीची (१८:३३) प्राप्ती करून जे दृढभक्तीने सद्‌गुरूंची भक्ती करतात ते कृतकृत्य होतात; 'ज्या एकनिष्ठ धृतीने मन, प्राण, इंद्रियें यांच्या क्रिया नियंत्रित करतां येतात.' अशी धृति नसलेले संशयग्रस्त मात्र होत नाहीत.६२. त्यासाठी कल्याणाची (मोक्षाची) इच्छा असेल संशयरहित होऊन मानव देहांत लीला करणाऱ्या गुरूंची भक्ती कर. भवसागर पार करशील. 'भवाब्धिं द्राक्तरिष्यसि' असाही पाठ आहे.६३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील दुसरा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## अथ तृतीयोऽध्यायः।।

**नामधारक उवाच ।।**

**त्रय्यात्मासौ कुतो जातो भूमौ नर इवेश्वरः । यं ब्रवीषि परं ब्रह्म तन्मे शुश्रूषवे वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**धन्योऽस्यनुगृहीतोऽसि यत्ते भक्तिरधोक्षजे । संजाता भवबन्धघ्नी हर्षो मेऽतीव वर्धते ।।२।।**

**कोऽपि गां पर्यटन्तं मां न पृच्छति गुरोः कथाम् । त्वयाद्य भक्तचन्द्रेण बोधाब्धिर्मे प्रपूरितः ।।३।।**

नामधारक उवाच। असौ त्रय्यात्मा ईश्वरः, यं परं ब्रह्म ब्रवीषि, भूमौ नर इव कुतः जातः तत् मे शुश्रूषवे वद।१। सिद्ध उवाच। धन्यः असि, अनुगृहीतः असि, यत् ते अधोक्षजे भव+बन्ध+घ्नी भक्तिः संजाता। मे हर्षः अतीव वर्धते।२। गां पर्यटन्तं मां कः अपि गुरोः कथां न पृच्छति। अद्य त्वया भक्त+चन्द्रेण मे बोध+अब्धिः प्रपूरितः।३।

अनसूयेचे सत्त्व हराया तिसऱ्या अध्यायी। स्त्रीहट्ट पुरविण्या आली देवत्रयी। झाली बाळे, अशी सतीची मोठी पुण्याई। तशीच वदले सिद्ध सरस्वति अंबरीषकथाही।।१।।

आपण केलेल्या प्रश्नांपैकी एकाचे (गुरूंचा रोष झाल्यास कुणीच (देवही) रक्षण करूं शकत नाही हे कसे?) या प्रश्नाचे उत्तर मिळाले पण 'हे गुरू त्रयमूर्ति कसे झाले?' या प्रश्नाचे 'नरदेहाने लीला करीत आहेत' असे संकेतात्मक उत्तर मिळाल्याने अधिक स्पष्टीकरणाच्या अपेक्षेने नामधारक विचारीत आहे. 'ज्याला आपण परब्रह्म असे म्हणतां अशा ह्या त्रिमूर्ति भगवंताने मानवासारखा पृथ्वीतलावर कसा जन्म घेतला? ते मला ऐकायचे आहे तरी (कृपा करून मला) सांगा.'१. सिद्धमुनि त्याचे अभिनंदन करीत म्हणतात, 'धन्य आहेस. तुझ्यावर (गुरूंचा) अनुग्रह झाला आहे. तुझ्या मनांत संसारपाशांतून सोडवणारी भगवद्भक्ती उद्भवली आहे हे पाहून मला अतीव आनंद झाला आहे.'२. '(खरोखर) ह्या भूमीवर विचरत असतां मला कुणीही गुरूच्या कथा विचारीत नाही. तुझ्यासारख्या भक्तरूपी चंद्राच्या दर्शनाने माझा ज्ञानसागर उचंबळून आला आहे.'३.

**अनन्ताः सन्त्यनन्तस्य लीलाः प्रश्नमृतेपि ताः । न वक्तुर्यान्ति निजधी-परिणामावधिं स्मृतिम् ।।४।।**
**कलौ तु नास्तिका मर्त्यास्तत्कथाश्रवणात्मकम् । प्लवं तर्तुं भवाब्धिं नो विदुर्मज्जन्त्यतोऽत्र ते ।।५।।**
**यत्राम्ब्वविन्तु तृष्णोर्मिर्ग्रहाः कामादयो ध्वनिः । भोगोऽपारेऽत्र नौस्त्वेषा गुरुर्नेता कृपामरुत् ।।६।।**

अनन्तस्य लीलाः अनन्ताः सन्ति। निज+धी+परिणाम+अवधिं वक्तुं ताः अपि प्रश्नं ऋते स्मृतिं न यान्ति।४। कलौ तु नास्तिकाः मर्त्याः भवाब्धिं तर्तुं तत्+कथा+श्रवण+आत्मकं प्लवं नो विदुः। अतः ते अत्र मज्जन्ति।५। यत्र अवित् तु अम्बुः, तृष्णा ऊर्मिः, कामादयः ग्रहाः, भोगो ध्वनिः। अत्र अपारे तु एषा नौ, गुरुः नेता, कृपा मरुत्।६।

'अनंत अशा भगवंताच्या लीला अनंत आहेत. आपल्या बुद्धीच्या मर्यादानुसार त्या आठवल्या तरी कुणी तरी प्रश्न केल्याशिवाय त्या सांगितल्या जात नाहीत.'४. या कलियुगातील नास्तिक मानवांना भवसागरातून तारणारी गुरुकथाश्रवणरूपी नौका माहीत नसल्याने ते ह्या संसारसागरांत बुडत असतात.'५.

**भवसागर -** ज्या भवसागरांत, अज्ञान हेच पाणी आहे, आशांच्या उंच उंच लाटा आहेत, कामक्रोधादि षड्रिपु ह्याच सुसरी आहेत, सुखदुःखांच्या भोगाने प्रस्फुटणारे हर्षशोकाचे ध्वनि हेच त्या सागराचे गाज आहेत. ह्या अपार भवाब्धीत ही गुरुकथा नावेसारखी आहे, गुरूच सारंग आहेत आणि त्यांची कृपा हाच अनुकूल वारा आहे. भगवत्पूज्यपादाचार्यांनी (ऐतरेय उपनिषदातील १:२:१ या मंत्रातील *'अस्मिन्महत्यर्णवे'* या पदावरील भाष्यांत) असे रूपक केले आहे. 'अविद्या, काम आणि कर्म यांच्यायोगे झालेले प्रचंड दुःख हेच पाणी; तीव्र व्याधी, जरा आणि मृत्यू ह्याच सुसरी-मगरी; विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणाऱ्या सुखालेशाचा क्षणभंगुर विसावा सोडल्यास पांचही इंद्रियांच्या तृष्णारूपी वायूने क्षोभविलेल्या शेकडो अनर्थांच्या प्रचंड लाटा; महारौरवादि अनेक नरकातील जीवांच्या हाहाःकाराच्या आक्रोशातून घुमणारा कल्लोळ; असा हा अनादि, अनंत, अपार, निराधार संसारसागर! इथे सत्य, आर्जव, दान, दया, अहिंसा, शम, दम, धृति इत्यादि आत्मगुणांच्या शिदोरीने भरलेली ज्ञानरूपी नौका आहे; सत्संग आणि सर्वत्याग हाच मार्ग आहे आणि मोक्ष हे तीर आहे.'६.

**तस्माद्दिष्ट्या साधनानि प्राप्तान्यत्राप्ययत्नतः । तरिष्यसि भवाब्धिं स्रागतो वक्ष्ये कथाः श्रृणु ।।७।।**
**इत्युक्त्वाऽमरजाभीमासङ्गमे ह्युपविश्य सः । गुर्वधिष्ठितकल्पद्रु-मूलेऽस्मै प्राह सत्कथाः ।।८।।**
**मुमुक्षुभेषजं मुक्त-जीवनं विषयीष्टदं । श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वाद्वच्मि तेऽल्पकम् ।।९।।**

तस्मात् दिष्ट्या अत्र अयत्नतः अपि साधनानि प्राप्तानि। भवाब्धिं स्राक् तरिष्यसि। अतः कथाः वक्ष्ये। शृणु।७। इति उक्त्वा सः अमरजा+भीमा+सङ्गमे गुरु+अधिष्ठित+कल्प+द्रु+मूले हि उपविश्य अस्मै सत्कथाः प्राह।८। श्रीगुरोः चरितं मुमुक्षु+भेषजं मुक्त+जीवनं विषयी+इष्टदं वाक्+हृत्+दूरत्वात् ते अल्पकं वच्मि।९।

त्याप्रमाणे सद्भाग्याने सद्गुरुभेट आणि गुरुकथाश्रवण ही साधने अनायासे तुला इथे लाभली आहेत. तू शीघ्रच भवसागर तरून जाशील. तरी मी कथा (गुरुचरित्र) सांगतो ती तू ऐक.'७. असे बोलून ते सिद्ध मुनि भीमा आणि अमरजा संगमावर श्रीगुरू नरसिंहसरस्वतींनी स्थापिलेल्या कल्पवृक्षाच्या तळवटी बसून ह्या शिष्यत्वाने अंगीकारलेल्या नामधारकाला गुरुचरित्रातील सुंदर कथा (किंवा सत् म्हणजे भगवंत त्याच्या कथा - भगवत्कथा) सांगू लागले. श्रीगुरूंनी स्थापल्याने त्या अश्वत्थाला कल्पवृक्षत्व आले आहे. शिवाय त्या वृक्षांत मनोकामना पूर्ण करण्याचा गुण आहे हे पुढे १९व्या अध्यायात स्पष्ट केले आहेच. ('ह्या अक्षय्य पुण्यदायक वृक्षाला पुत्रादि कामना पुरविण्यास वेळ लागत नाही.'(४५) 'तरी हे साध्वि, तू त्याची विधिवत् पूजा कर; तो शीघ्र फल देणारा आहे.'(४८).८.

**श्रीगुरुचरित्राची थोरवी -** ह्या मृत्युलोकात विषयासक्त, मुमुक्षु आणि मुक्त असे तीन प्रकारचे लोक आहेत. त्या तिघांनाही हे श्रीगुरूंच्या चरित्राचे वाचन कसे लाभदायक आहे ते सांगतात. विषयी लोकांच्या कामना ह्याच्या पठणाने अथवा श्रवणाने पूर्ण होतात; तर मुमुक्षूंसाठी ते संसाररूपी व्याधीपासून सोडविणारे औषध आहे; मुक्तांना निरुपम आनंदाचा ठेवा असल्याने जीवनभूत आहे; तसेच 'वेदांत, गुरु आणि ईश्वर या त्रयीचे आजीवन सेवन करावे. आधी ज्ञानप्राप्तीसाठी आणि (ज्ञानप्राप्ती)नंतर कृतघ्नतादोष लागू नये यासाठी', (तत्त्वोपदेश - ८६)

**जगत्येकार्णवीभूते शेषतल्पश्रितोऽस्पृहः । नारायणो जगत्स्रष्टुं मायामुद्भाव्य सोऽण्डजम् ।।१०।।**
**स्रष्टारं व्यसृजत्सृष्ट्यै सप्तर्षीन् सोऽपि मानसान् । तत्रैकोऽत्रिस्तपस्वीशो यस्याभूद्भगवान्सुतः ।।११।।**

जगति एक+अर्णवी+भूते शेष+तल्प+श्रितः अस्पृहः नारायणः मायां उद्भाव्य सः अण्डजं स्रष्टारं व्यसृजत्। सः अपि मानसान् सप्तर्षीन् (असृजत्)। तत्र एकः तपस्वी अत्रिः यस्य ईशः भगवान् सुतः अभूत्।१०-११।

या वचनानुसार कृतघ्नता दोषाचा परिहार करून जीवन सफल करणारे आहे. गुरुचरित्रांत वेदांत, गुरू आणि ईश्वर या तिन्हींचेही प्रतिपादन आहे. हे गुरुचरित्र *'यतो वाचो निवर्तन्ते'* ह्या श्रुतीप्रमाणे (तै.उ. २:४), वाणीच्या आणि मनाच्याही अतीत आहे. तरी मी माझ्या बुद्धीप्रमाणे थोडेसे तुला सांगतो.९.

दुसऱ्या परार्धाच्या अंती ब्रह्मदेवाच्या दिनांतीं जो नैमित्तिक प्रलय होतो त्यावेळी सर्व जग जलमय झाल्याने एक समुद्रच राहतो. अशा त्या जलांतही शिल्लक असलेला जो शेष त्याचीच शय्या करून निष्काम असा नारायण ('नर' म्हणजे मानव; त्याच्यापासून झालेली तत्त्वे म्हणजे 'नार'; तीच ज्याचे *'अयन'* प्राप्तीचे उपाय आहेत. किंवा *'नार'* म्हणजे मानवसमुदाय हेच ज्याचे निवासस्थान आहेत तो (मनुस्मृति १:१०)) पहुडला असतां जगाची उत्पत्ती करण्यासाठी त्याने सदसद्विलक्षण अशी आपली अनिर्वाच्य प्रकृति निर्माण केली. जी खरी आहे किंवा नाही ह्याविषयी मानवी बुद्धीला निर्णय करतां येत नाही. निर्माण केली याचा या ठिकाणी अर्थ तिला आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) कार्यान्वित करून अंडापासून जन्मलेल्या ब्रह्मदेवाला जागे केले. (**उद्भाव्य** याचा अर्थ इथे जागे केले असा होतो. कारण हा नैमित्तिक प्रलय आहे जेव्हा ब्रह्मदेव झोपलेला असतो. प्राकृतिक प्रलयांती ब्रह्मदेवाचाही लय होत असल्याने त्या वेळी सृष्टीसाठी पुन्हां ब्रह्मदेवाची उत्पत्ति करावी लागते.) त्या जागलेल्या ब्रह्मदेवानेही मरीचि, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, पुलह, अंगिरस आणि दक्ष ह्या सप्तर्षींना आणि सनत्कुमार, सनक, सनन्दन, सनातन आणि नारद ह्या मानसपुत्रांना निर्माण केले. त्यांमध्ये अत्रि हा श्रेष्ठ तपस्वी होता, ज्याच्या पोटी भगवान श्रीदत्तप्रभूंनी जन्म घेतला.१०-११.

**ऋषेरत्रेस्तपोऽर्थस्य पातिव्रत्यविभूषिता । आसीद् भार्याऽनसूयाख्या त्रिलोक्यां विश्रुता सती ।।१२।।**
**जातोर्वी मृदुलार्काग्नी शीतौ मन्दो मरुद्भिया । तस्या देवाः पदापाय-भ्रान्त्याऽऽपुः शरणं हरिम् १३।।**
**एकदा नारदोऽप्येत्य तद्धर्मान्ब्रह्मविष्णवजान् । प्राब्रवीत्रेदृशी साध्वी सर्वदाऽभ्यागतप्रिया ।।१४।।**

तपः+अर्थस्य ऋषेः अत्रेः पातिव्रत्य+विभूषिता भार्या त्रिलोक्यां विश्रुतां सती आसीत्।१२। तस्या भिया ऊर्वी मृदुला, अर्क+अग्नी शीतौ, मरुत् मन्दः जाताः। देवाः पद+अपाय+भ्रान्त्या हरिं शरणं आपुः।१३। एकदा नारदः अपि ब्रह्म+विष्णु+अजान् एत्य तत् धर्मान् प्राब्रवीत्, 'सर्वदा अभ्यागत+प्रिया ईदृशी साध्वी न'।१४।

ईश्वराने सृष्टि उत्पन्न केल्याविषयी वेदवचने यापूर्वी (प्रथमाध्यायाच्या टीकेत) उद्धृत केली आहेत. इथे हे लक्षांत घ्यायला हवे की ईश्वराचे कर्तृत्व हे या वेदवाक्यांचे तात्पर्य नाही; तर ईश्वराच्या कर्तृत्वाचा निषेध करण्यासाठी आधी मायेचा विलास (सृष्टी) दाखविला आहे. आणि मग *'निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरञ्जनं'* (श्वेताश्वतर उ. ६:१९) *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०) *'नेह नानास्ति किञ्चन'* (कठ उ. २.४.११) *'यस्मिन्सर्वा..'* (ईशावास्य उ. ६) *'अतोऽन्यदार्त्तं'* (बृहदारण्यक उ. ३.४.२) अशा निषेधवाक्यांनी अद्वैताचा निरास केला आहे. यापेक्षा इथे विस्तार करीत नाही.

**अत्रि आणि अनसूया -** प्रस्तुत ग्रंथांत श्रीदत्तात्रेयांचे प्राधान्य असल्याने त्यांच्या अवताराचा उपोद्घात **ऋषेः** या श्लोकापासून केला आहे. ऋषी म्हणजे मंत्रदृष्टा. ऋग्वेद सर्वानुक्रमणीत सांगितल्याप्रमाणे अत्रि ऋषी ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलाचे द्रष्टे आहेत. 'सूर्याला राहूने अंधःकाराने झांकोळले असतां अत्रि ऋषींनीच त्याला सोडविले. इतर कुणालाही ते शक्य झाले नाही' असा अत्रि ऋषींच्या ज्ञानाचा गौरव ऋग्वेदात केला आहे (ऋ. ४.४०.९). तप हेच ज्याचे अर्थ म्हणजे सर्वस्व आहे अशा अत्रींची पत्नी अनसूया होती. नांवाप्रमाणेच जिच्यात असूयेचा लेशही नव्हता. 'रसाकर' नांवाच्या ग्रंथात, केसांत घालायची, देहावर घालायची, परिधान करायची आणि विलेपन करायची अशी चार प्रकारची आभूषणे सांगितली असली तरी अनसूयेचे पातिव्रत्य हेच एकमेव भूषण होते हाच विशेष! तीनही लोकांत तिच्या पातिव्रत्याची ख्याति होती.

**इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य विषीदन्त्य उपस्थिताः । तद्देव्योऽसहमाना द्राग्बभूवुर्मूर्छिता भृशम् ।।१५।।**
**पतिव्रतामानिनीस्ताः सावित्रीश्रीश्वरीस्त्रयः । आश्वास्यातिथिवद्भूत्वा रोषाच्छम्भुं सतीं ययुः ।।१६।।**

इति ऋषेः वाक्यं आकर्ण्य उपस्थिताः तत्+देव्याः विषीदन्त्य द्राक् असहमाना भृशं मूर्छिता बभूवुः।१५। पतिव्रता+मानिनीः ताः त्रयः सवित्री+श्री+ईश्वरीः आश्वास्य (देवाः) अतिथिवत् भूत्वा रोषात् सतीं शम्भुं ययौ।१६।

'अत्रीची जशी अनसूया' असा तिचा दाखला वेदमंत्रांतही दिला आहे (ऋग्वेद परिशिष्ट).१२. 'ज्या परमात्म्याच्या धाकाने अग्नी, सूर्य, इंद्र, वायु, मृत्यू हे पाचही आपापली कार्ये करतात' (कठ उ. २.३.४) तोच धर्माचा आधार आहे. (*'एष सेतुर्विधरण'* बृ.उ. ४.४.२२) असा धर्मरूपी परमात्माच अनसूयेने आपल्या आचरणात स्वाधिकाराने संपूर्णतः धारण केल्याने, पृथ्वी त्या सतीला दुखवू नये म्हणून मृदु झाली, अग्नी आणि सूर्य शीतल झाले आणि वायुसुद्धा तिच्या भयाने मंद वाहू लागला. सर्वच देवतांना आपापल्या पदांपासून ही अनसूया भ्रष्ट तर करणार नाही ना असा धाक उत्पन्न झाला आणि ते भगवान विष्णूंना शरण गेले.१३. एकदा नारदमुनीनीसुद्धा त्या अनसूयेच्या पातिव्रत्य, आतिथ्य आदि धर्माचरणाचे वर्णन ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांच्यापुढे करून 'अशी सदैव अतिथींचा स्नेहाने सत्कार करणारी अनसूयेसारखी साध्वी कुणीच नाही' असे उद्गार काढले.१४. हे देवर्षींचे वचन ऐकतांच तिथे जवळच असलेल्या तिन्ही देवांच्या पत्नींचा 'विश्वात आम्हीच काय त्या पतिव्रता' असा अभिमान दुखावला आणि मत्सरामुळे झालेला संताप सहन न होऊन त्या मूर्छित झाल्या.१५. सावित्री, लक्ष्मी आणि पार्वती यांची ही अवस्था पाहून त्यांना आश्वासन देऊन ब्रह्मा-विष्णु-महेश त्वेषाने अतिथिवेष घेऊन अत्रिऋषींच्या आश्रमाला अनसूयेकडे आले. खरे तर आत्माराम ईश्वरांना अशी प्रवृत्ती होण्याचे कारणच नाही; पण स्त्रियांच्या बुद्धीने वागल्यास कसा अनर्थ होतो हे जणू जगात दाखविण्यासाठीच ते सतीच्या सत्त्वहरणाला प्रवृत्त झाले. किंवा 'अरोषात्' असा विग्रह करून स्त्रियांच्या समाधानासाठी ते निघाले तरी ते शांतपणेच 'पतिव्रता नारी ही तीर्थ आहे' ह्या स्मृतिवचनाच्या द्योतनासाठी निघाले.१६.

**पतिव्रतापि तान्दृष्ट्वा स्वाश्रमाभ्यागतान्सुरान् । प्रत्युद्गत्वा समानीय स्वासने संन्यवेशयत् ।।१७।।**
**वीजितान्कृतपच्छौचान्सूपविष्टान्जगौ सती । स्वागतं वोऽद्य किं कार्यं मुनिस्तु तपसे गतः ।।१८।।**
**त ऊचुः साध्वि नो विद्मस्तपःसक्तमना मुनिः । कदाऽऽयातीत्यतो देहि क्षुधितेभ्योऽन्नमाश्वलम् ।।१९।।**
**इति श्रुत्वा गिरस्तेषां तथेत्युक्त्वा गृहं गता । पात्राण्यासाद्य तेभ्योऽन्नं परिविष्टं न्यवेदयत् ।।२०।।**

पतिव्रता अपि तान् स्वाश्रम+अभ्यागतान् सुरान् दृष्ट्वा प्रत्युत्+गत्वा समानीय सु+आसने संन्यवेशयत्।१७। वीजितान् कृत+पत्+शौचान् सु+उपविष्टान् (तान्) सती जगौ। वः स्वागतम्। अद्य किं कार्यम्? मुनिः तु तपसे गतः।१८। ते ऊचुः। (हे) साध्वि मुनिः तपः+सक्त+मनाः नः विद्मः। कदा आयाति? अतो क्षुधितेभ्यः आशु अलं अन्नं देहि।१९। इति तेषां गिरः श्रुत्वा 'तथा' इति उक्त्वा गृहं गता पात्राणि आसाद्य तेभ्यः परिविष्टं अन्नं न्यवेदयत्।२०।

त्या सतीनेही त्या अतिथिवेषांतील देवांना पाहून त्यांना सामोरे जाऊन, सन्मानाने घरांत आणून आपापल्या सुशोभित आसनांवर बसविले. त्यांचे पाय धुवून ते स्वस्थ बसल्यावर त्यांना कुशलप्रश्न विचारून पंख्याने वारा घालीत ती बोलली, 'आपलं स्वागत असो! मुनिवर तर तपस्येला गेले आहेत. आपण आज आपले काय कार्य आहे ते मलाच सांगावे.' त्यावर ते देव म्हणाले, 'मन आणि इंद्रिये यांचे ऐकाग्र्य हेच परम तप सर्व धर्माहून श्रेष्ठ आहे; तोच परम धर्म आहे' (महाभारत १२.२५०.२) ह्या वचनानुसार बाह्य इंद्रिये आणि अंतःकरण यांचे समाधान (संतुलन) हे तपच ब्रह्मप्राप्तीचे द्वार आहे. ऋषिवर्यांना त्याची आवड आहे हेही आम्हाला माहिती आहे. तेव्हा ते कधी येतील काय सांगावे? आम्ही भुकेजलो आहोत. तरी तू आम्हांला लवकर (मुनींची वाट न पाहता) पुरेसं अन्न दे.'१९. हे त्यांचे बोलणे ऐकून 'ठीक आहे, जेवायला वाढते' असे म्हणून अनसूयेने स्वयंपाकघरांत जाऊन ताटांत अन्न वाढून आणले. त्यांच्यापुढे ताटे ठेवून पाणी फिरविले आणि त्यांना जेवायची विनंति केली.२०.

**त आहुः साध्वि नो देहि नग्ना भूत्वेत्यपेक्षितम् । नेदं चेद्रोचतेऽन्यत्र गच्छामः क्षुधिता इतः ।।२१।।**
**तच्छ्रुत्वापि प्रहस्यैषा ऋषेः सङ्गात्तपस्विनः । पूताया मम कामेन किं भवेच्चेत्तथाऽकृते ।।२२।।**
**शप्त्वा गच्छन्ति विमुखा महान्तोऽमी ममात्मजाः । इति स्वगतमुद्भाव्य तथेत्युक्त्वांशुकं जहौ ।।२३।।**

ते आहुः, '(हे) साध्वि, नः नग्ना भूत्वा देहि इति अपेक्षितम्। इदं न रोचते चेत् इतः क्षुधितः अन्यत्र गच्छामः।२१।' तत् श्रुत्वा अपि प्रहस्य 'तपस्विनः ऋषेः सङ्गात् पूताया मम कामेन किं भवेत्? तथा अकृते महान्ताः विमुखाः शप्त्वा गच्छन्ति। अमी मम आत्मजाः।' इति स्वगतं उद्भाव्य 'तथा' इति उक्त्वा अंशुकं जहौ।२२-२३।

त्यावर ते तिघे देव म्हणाले, 'हे सती, तू विवस्त्र होऊन आम्हांला (अन्न) वाढावेस अशी आमची इच्छा आहे. हे तुला रुचत नसेल तर आम्ही उपाशीच इथून निघून इतरत्र जाऊ.'२१. त्यावर अनसूया सती हे त्यांचे विपरीत बोलणे ऐकूनही हसली आणि मनातच विचार करू लागली, 'तपस्वी (अत्रि) मुनींच्या संगाने माझे अंतःकरण शुद्ध झाले आहे. मला कामविकाराचे काय भय?' पातिव्रत्याचा भंग करणारा कसलाही विचारच माझ्या मनात येऊ शकत नाही असा तिला आत्मविश्वास होता. अतिथिसत्काराच्या इच्छेनेसुद्धा परपुरुषासमोर नग्नावस्थेत वावरणे हे प्रायचित्ताला कारण ठरू शकेल अशीही शंका नको. *'कामोऽकार्षीत् कामः करोति नाहं करोमि, कामः कर्ता नाहं कर्ता, कामः कारयिता नाहं कारयिता'* (नारायणोपनिषत् ६१) हा मंत्र विवेकी लोकांना कामविकाराचा आत्म्याशी कांहीच संबंध नाही हेच शिकवतो; अविवेकी लोकांसाठी मात्र प्रायश्चित्ताला उपयुक्त ठरतो. तेव्हा मला कामाची काय भीती? ह्याउलट मी जर ह्यांच्या सांगण्यानुसार वागले नाही तर आम्हांला शाप देऊन हे महात्मे निघून जातील. तेव्हां *'स इद्भोज'* या मंत्रांच्या (ऋग्वेद १०.११७.३) अतिथींचा सत्कार करण्याने इष्टफल आणि न करण्याने अनिष्ट फलप्राप्तीच्या अन्वय आणि व्यतिरेकाने केलेल्या प्रतिपादनानुसार आपण ह्यांच्या मनाप्रमाणे करावे असा मनोमन निश्चय करून त्या सतीने अंगावरील वस्त्र काढून टाकले.२३.

**तदैव तेऽभवन्बाला निर्विकारा अपीश्वराः । जगत्सृडीश्वरहराः पातिव्रत्यप्रभावतः ।।२४।।**
**तान्सा तथाविधान्प्रेक्ष्य सचित्राभूद्धृतांशुका । पयः प्रसूत्या इवास्यास्तदालं स्तनतोऽस्रवत् ।।२५।।**
**सपद्येवाद्भुताविष्टा प्रेम्णा हृष्टतनूरुहा । प्रत्येकं पाययामास क्षीरं तेऽपि पपुर्मुदा ।।२६।।**
**जगदुत्पत्तिकरण-सुश्रान्त इव विश्वसृट् । पीत्वा पतिव्रतास्तन्यं परमां शान्तिमाययौ ।।२७।।**
**विश्वम्भरो विश्वरक्षा-क्रियात्रस्त इवामलम् । पतिव्रतापयः प्राश्य पीनां विश्रान्तिमाविशत् ।।२८।।**

तदा एव ते ईश्वराः जगत्+सृट्+ईश्वर+हराः अपि पातिव्रत्य+प्रभावतः निर्विकाराः बालाः अभवन्।२४। सा तान् तथाविधान् प्रेक्ष्य सचित्रा धृत+अंशुका अभूत्। तदा अस्याः स्तनतः प्रसूत्याः इव अलं पयं अस्रवत्।२५। सपदि एव अद्भुत+आविष्टा हृष्ट+तनू+रुहा प्रेम्णा प्रत्येकं क्षीरं पाययामास। ते अपि मुदा पपुः।२६। विश्व+सृट् जगत्+उत्पत्ति+करण+सुश्रान्त इव पतिव्रता+स्तन्यं पीत्वा परमां शान्तिं आययौ।२७। विश्वं+भरः विश्व+रक्षा+क्रिया+त्रस्त इव पतिव्रता+पयं अलं प्राश्य पीनां विश्रान्तिं आविशत्।२८।

तत्क्षणीच जगाची उत्पत्ति करणारा ब्रह्मदेव, नियंता विष्णू आणि संहर्ता शंकर ह्या तिघाही ईश्वरांची पातिव्रत्याच्या प्रभावाने निरागस बाळे झाली.२४. ती पतिव्रता त्या अतिथींची अशी बाळे झालेली पाहून आश्चर्यचकित झाली आणि आपली सोडलेली वस्त्रे परत नेसली. त्या वेळी नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीप्रमाणे तिच्या स्तनांतून दूधाच्या धारा सुरू झाल्या.२५. लगेच त्या आश्चर्याने थक्क झालेल्या अनसूयेला प्रेमाचे भरते आले आणि तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. एकेका बाळाला अंगावर घेऊन ती पाजायला लागली. ती बाळेही अत्यंत आनंदाने दूध पिऊ लागली.२६. जगाच्या उत्पत्तिकार्याने (जणू) थकून गेलेल्या ब्रह्मदेवाला ते पतिव्रतेचे दूध पिऊन परम शांतीचा अनुभव आला.२७. विश्वंभर विष्णू सतत विश्वाचा सांभाळ करून (जसा काही) त्रस्त झाला होता. पतिव्रतेचे दूध पोटभर पिऊन त्याला विश्रांती मिळाली.२८.

**हरस्तु विश्वसंहार-कर्मतष्ट इव क्षणात् । सत्यौधस्याशनात्तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ ।।२९।।**
**स्वधर्मज्ञाततत्सत्त्वा पाययित्वाऽपि तान्पयः । सा जगौ तत्कथोद्धातं प्रेम्णा विन्यस्य पालके ।।३०।।**
**अत्रान्तरे वनादेत्य श्रुतगीतः सतीमुखात् । सर्वं श्रुत्वेश्वरान्ज्ञात्वा ध्यानान्नत्वाऽस्तुवन्मुनिः ।।३१।।**
**विश्वसर्गस्थितिप्रान्त-निदानं विश्वसाक्षिणम् । विष्णुं विश्वमयं वन्दे विश्वाद्यं विश्वसंग्रहम् ।।३२।।**

हरः तु विश्व+संहार+कर्म+तष्ट इव सती+औधस्य+अशनात् क्षणात् तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ।२९। स्वधर्म+ज्ञात+तत्+सत्त्वा अपि तान् पयः पाययित्वा प्रेम्णा पालके विन्यस्य सा तत्+कथा+उद्धातं जगौ।३०। अत्र+अन्तरे मुनिः वनात् एत्य, सती+मुखात् सर्वं श्रुत्वा ध्यानात् ईश्वरान् ज्ञात्वा नत्वा अस्तुवन्।३१। विश्व+सर्ग+स्थिति+प्रान्त+निदानं विश्व+साक्षिणं विश्व+मयं विश्व+आद्यं विष्णुं वन्दे।३२।

विश्वसंहाराच्या कर्माने जणू रोडावलेल्या रुद्राला सतीचे स्तन्य (उधस् म्हणजे स्तन त्यापासून झालेले ते औधस्य) पिऊन पुष्टी आली आणि 'सुगंधिं पुष्टिवर्धनम्' (ऋग्वेद सं. ७.५९.१२) ह्या रुद्रमंत्रानुसार इतरांचीही पुष्टी वाढविण्याचे सामर्थ्यही त्यांच्यात आले.२९. आपल्या पातिव्रत्यधर्माच्या प्रभावाने त्या बालकांचे ईश्वरत्व जाणून, ती अनसूया त्यांना दूध पाजून, पाळण्यात घालून भक्तिप्रेमाने त्यांच्या कथा गाऊ लागली.३०. थोड्या वेळाने (आह्निक पूर्ण करून) वनाहून आलेल्या अत्रि ऋषींनी आपल्या पत्नीचे गायन ऐकले आणि तिच्याच मुखाने सर्व हकीकतही ऐकली. मग त्यांनी ध्यानाच्या प्रभावाने त्या भगवंतांना ओळखले आणि त्यांची स्तुती केली.३१. 'रजोगुणाच्या प्रादुर्भवाने विश्वाची उत्पत्ती (**सर्ग**), सत्त्वगुणाने **स्थिति** (दुष्टांचे दमन आणि साधूंचे रक्षण) आणि तमोगुणाने प्रलय (**प्रान्त**) ह्या सर्वांचे अभिन्ननिमित्तोपादानरूप आदिकारण (**निदान**) आपण आहां. विश्वाच्या आंत *'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा'* (याच्यावांचून कोणी दुसरा पहाणारा नाही) या वेदोक्तीप्रमाणे (बृ.उ. ३.७.२३) साक्षित्वाने राहूनही निर्लिप्त आहां.' *'सु'* चांगली *'पर्णं'* गति किंवा परस्पर सहाय ज्यांचे आहे असे *'सयुजौ'* सारखे *'सखायौ'* सखे *'द्वा'* दोन पक्षी, जीव आणि ईश्वर,

**तपस्तप्तं यदर्थं स त्वमेकोऽपीश लीलया । त्रिधा भूत्वात्मनात्मानं स्वैर्गुणै रमयस्युत ।।३३।।**

(हे) ईश यत्+अर्थं तपः तप्तं सः त्वं एकः अपि लीलया स्वैः गुणैः त्रिधा भूत्वा आत्मना आत्मानं रमयसि उत।३३।

*'समानं'* एकाच *'वृक्षं'* वृक्षावर ('ओव्रू छेदने' ह्या धातूपासून तत्त्वज्ञानाने छेदण्यास योग्य,) भगवद्गीतेच्या १५व्या अध्यायातील रूपकानुसार शरीराला *'परिषस्वजाते'* बिलगलेले, वसलेले आहेत. *'तयोः'* त्यांच्यापैकी *'एकः'* जीव *'स्वादु'* (कडू)गोड *'पिप्पलं'* कर्मफळे *'अत्ति'* खातो, भोगतो म्हणून (कर्म)बंधनांत सांपडतो. *'अन्यः'* दुसरा ईश्वर मात्र *'अनश्नन्नभिचाकशीति'* न खातां (चांगल्या वाईट कर्मफलांचा भोग न घेतां) केवळ साक्षित्वाने पहात असतो. (ऋग्वेद १.१६४.२०) 'असा जर मी आहे तर मग मी परिच्छिन्न आहे का?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात **विष्णुं** व्यापनशील अर्थात् सर्वव्यापी, देश, काल, वस्तु या सर्व परिच्छेदांपासून मुक्त आहां. 'असे असेल तर माझ्याहून वेगळ्या अशा या जगाची गति काय?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात, विश्वरूपी अध्यासाचा विवर्त या न्यायाने आपण विश्वाचे आद्य कारण असून आपल्यापासून वेगळे अस्तित्त्वच त्याला नाही; त्यामुळे आपण **विश्वमय** आहात. सर्प, माला, जलधारा, काठी इत्यादि भासमान रूपांना केवळ एका दोरीहून अन्य काही वास्तवता नसते त्याप्रमाणे नामरूपात्मक जगताचे आपणच एकमेव वास्तव आहांत (ऐतरेयारण्यक २.४.१). अशा आपल्याला वन्दन असो.३२. ज्या परमात्म्याच्या दर्शनासाठी मी तप आचरले तो तू एकच भगवंत लीलेने, स्वनिर्मित सत्त्व, रज आणि तम या गुणांचा अंगीकार करून ब्रह्मा, विष्णू आणि शंकर अशी तीन रूपे धारण करून आपणच आपल्याशी खेळत असतोस.३३.

**अध्यारोपापवादाभ्यां समुद्भूतं जगत्ततः । अहंममाभिमानेन पार्थक्यं त्वस्य नापरम् ।।३४।।**

जगत् अधि+आरोप+अप+वादाभ्यां समुद्भूतम्। ततः अहं+मम+अभिमानेन तु अस्य पार्थक्यं, न अपरम्।३४।

**अध्यारोप आणि अपवाद -** तुझ्या या अविकृत स्वरूपापासूनच अध्यारोपाने - अध्यासाने, जगताची सृष्टी होते. आणि त्या अध्यासाच्या अपवादाने - निराकरणाने, तो जगदाभास लय पावतो. जसा अंधारात पडलेल्या दोरीवर सापाचा **अध्यारोप** होतो आणि दिवा लावून तो संभ्रम दूर केला की तो साप नाश पावतो तसेच हे आहे. ईश्वरसृष्टीत परमात्म्याच्या मायेकडे दृष्टिक्षेपणाने - ईक्षणाने, ह्या प्रक्रियेला आरंभ होतो आणि सोळा (पांच भूते आणि अकरा इंद्रिये) अंशांच्या जड विश्वात त्याच्या प्रवेशाने ती प्रक्रिया पूर्ण होते. जीवसृष्टीत हीच प्रक्रिया जाग्रत अवस्थेपासून सुरू होऊन आत्मज्ञानाने पूर्ण होते. अशा रीतीने भासमान होणाऱ्या जगतातील देहादिक उपाधीसंबंधी 'मी' असा अभिमान, घरदार, पत्नी, पुत्र, धन पशू इत्यादिकांविषयी 'माझे' असा अभिमान हेच आपल्या अविकृत स्वरूपात भेदाचा **(पार्थक्याचा)** आभास निर्माण करतात. **तु** शब्दाने हा मिथ्या असल्याचे सूचित केले आहे. आत्मसाक्षात्काराने हे नामरूपात्मक द्वैत (**अपरं**) नाहीसे होते. देहात प्रविष्ट होऊन जन्म-मरण-जाग्रति-स्वप्न-सुषुप्तिरूप संसारचक्रांत फिरणारा जीव कधीकाळी परमेश्वराच्या कृपेने, गुरू आणि शास्त्र यांच्या प्रसादाने, हे सर्व अनुभवाला येणारे पांचभौतिक जग, त्यांतील प्राणिमात्र हे कुठून येतात, यांचे रक्षण कोण करतो आणि यांचा लय शेवटी कुठे होतो याविषयी विचार करतो. नाना शास्त्रे धुंडाळून (परोक्ष ज्ञान) हा सर्व संसार मायेने कल्पिलेला असून मिथ्या आहे असा तो निश्चय करतो. मग अपरोक्ष ज्ञानाने म्हणजेच आत्मानुभवाने ब्रह्म हेच परम सत्य आहे अशी अनुभूती घेतो. हाच **अपवाद** होय. त्यानेच परब्रह्मस्वरूप आपल्याहून वेगळे कांहीच नाही, एकच (परमात्मा) सर्वां ठायी पहावा, या जगात नानाविध असे कांही नाही अशी त्याची खात्री पटते (बृ.उ. ४:४:१९-२०). मग अशा ह्या एकमेवाद्वितीय ब्रह्माची तीन रूपे कशी झाली असे म्हणाल तर आधी सांगितल्याप्रमाणे केवळ स्वतःच्या मनोरंजनासाठी केलेली ती एक लीला आहे. माझ्याच घरी

**इति स्तुवति तस्मिंस्ते पालके बालरूपतः । स्थिता अप्याद्यरूपैः स्वैः स्थित्वोचुस्तं वरं वृणु ।।३५।।**
**स प्राह साध्वीं सुभगे ब्रह्मविष्णुमहेश्वराः । त्वद्भक्त्याप्ता मनोदूरा अतोऽभीष्टं वरं वृणु ।।३६।।**

इति तस्मिन् स्तुवति ते बाल+रूपतः पालके स्थिता अपि स्वैः आद्य+रूपैः स्थित्वा ऊचुः,'वरं वृणु'।३५। सः प्राह, '(हे) साध्वि, सुभगे, त्वत्+भक्त्या मनो+दूराः ब्रह्म+विष्णु+महेश्वराः आप्ताः। अतः अभीष्टं वरं वृणु।'।३६।

का याचे उत्तरही पूर्वीच्या लोकांत मी केलेले तप असे आले आहेच. जगात आपली भक्तवशता प्रकट करण्यासाठी, माझ्या तपाचे निमित्त करून आपण अवतरला आहांत. वास्तविक आपला कुणी अन्य निर्माता नाही (**निमित्त कारण**) की इतर कशापासून (**उपादान**) आपली उत्पत्ती नाही. आपणच भगवद्गीतेत सांगितल्यानुसार (२:२०) जन्ममरणादि विकार आपल्याला स्पर्शू शकत नाहीत. केवळ भक्तांवर कृपा करण्यासाठीच आपण स्वेच्छेने अवतार धारण करता.३४.

याप्रमाणे अत्रि महर्षी स्तुति करीत असतांनाच, पाळण्यात बालरूपांनी तसेच राहून ते तीनही भगवंत आपल्या मूळ रूपांनी मुनींसमोर उभे राहिले; आणि त्यांना 'इष्ट वर मागून घ्या,' असे म्हणाले.३५. याप्रमाणे त्या त्रैलोक्यवंदित देवांना आपल्यासमोर उपस्थित होऊन असे बोलतांना ऋषिवर्यांनी 'हा अनसूयेच्या पातिव्रत्याचाच प्रभाव आहे,' असा विचार करून ते त्या सतीला म्हणाले, 'हे सौभाग्यवती (ईश्वरांचे मातृत्व तिला प्राप्त झाल्याने हे संबोधन आहे), मनाला सुद्धा दुर्गम असे ब्रह्मा-विष्णू-महेश तुझ्या भक्तीने आपल्या घरी आले आहेत. (हे पार्था, तो परमपुरुष केवळ अनन्य भक्तीनेच लाभतो ह्या वचनानुसार (भ.गी. ८:२२) भक्तीच मुख्य कारण आहे.) तरी तू तुला हवा असलेला वर मागून घे.'३६.

**साऽप्याह सुतपः सृष्ट्यै त्रिधाभूतेन वै भवान् । सृष्टोऽमुनामुमेवातः पुत्रत्वेन वृणोत्वजम् ।।३७।।**
**ऋषिः सोऽपीदमेवेष्टं मत्वा वव्रे तदेव हि । विष्णुः सर्वात्मनाऽहं ते मया दत्तः किलाब्रवीत् ।।३८।।**
**पतिव्रताप्रभावोऽयं बाला भूत्वेश्वराः स्थिताः । स्वस्वप्राग्रूपतोऽप्येते स्वं स्वं स्थानं ययुस्त्रयः ।।३९।।**

सा अपि आह, '(हे) सुतप, त्रिधा+भूतेन अमुना सृष्ट्यै वै भवान् सृष्टः। अतः अमुं अजं एव पुत्रत्वेन वृणोतु'।३७। सः ऋषिः अपि इदं एव इष्टं मत्वा तत् एव हि वव्रे। विष्णुः अब्रवीत्, 'अहं सर्व+आत्मनः मया ते दत्तं किल'।३८। अयं पतिव्रता+प्रभावः। ईश्वराः बालाः भूत्वा स्थिताः अपि एते त्रयः स्व+स्व+प्राक्+रूपतः स्वं स्वं स्थानं ययुः।३९।

हे महर्षींचे वचन ऐकून 'हा खरोखर आपल्या पतीच्या तपाचाच प्रभाव आहे, माझी भक्ती आणि पातिव्रत्य यांचे काय महत्त्व?' असा विचार करून ती नम्रपणे बोलली, 'हे श्रेष्ठ तपस्विन्! (अत्रिमुनींचे तप ईश्वरोद्देशाने आणि सात्त्विकतेने केलेले असल्याने त्यांत कसलाही दोष (किल्मिष) नसल्याने इथे त्याला सुंदर (सात्त्विक) तप असे म्हटले आहे.) तीन रूपे धारण करणाऱ्या या परमेश्वरानेच आपल्याला प्रजोत्पादनासाठी निर्माण केले आहे. तरी जन्मादि भावातीत त्रयमूर्ति भगवंतालाच आपण पुत्ररूपाने मागून घ्यावे.' पुत्र हा गौण आत्माच असल्याने त्या रूपाने अवतरलेल्या भगवंताच्या कोड-कौतुक, आलिंगन-चुंबन इत्यादींनी मुख्य आत्म्याची प्राप्ती सुलभ व्हावी हाच त्या साध्वीचा भाव होता.३७. ऋष् म्हणजे गती. ज्याची अतीत (भूत), अनागत (भविष्य) आणि वर्तमान ह्या सर्व काळांत गती आहे, जो हे सर्व जाणूं शकतो तो **ऋषी**. अशा त्या अत्रि ऋषींनाही हे आपल्या पत्नीचे म्हणणे पटले आणि त्याप्रमाणे त्यांनी तोच वर (तीनही देवांनी आपले पुत्र व्हावे असा) मागून घेतला. त्यावर त्या सर्वव्यापी भगवंताने 'मी माझे स्वतःचे पूर्णत्वाने तुला दान करतो,' अशा शब्दात ते मान्य केले.३८. अशा रीतीने ते ब्रह्मा-विष्णू-महेश बालकांच्या रूपाने अनसूयेच्या पाळण्यात राहून आपल्या मूळ रूपांनी आपापल्या स्थानी - अनुक्रमे सत्यलोक, वैकुंठ आणि कैलास या लोकांना निघून गेले.३९.

**पृथङ्नामानि बालेभ्यो ददौ तेभ्योऽर्थविन्मुनिः । पूर्णत्वेन मयाऽहं ते दत्त इत्युक्तवान् स्वयम् ।।४०।।**
**भगवानिति नाम्नैनं मुनिर्दत्तं चकार सः । ब्रह्मांशं चन्दनाच्चन्द्रमौग्रं दुर्वाससन्तथा ।।४१।।**
**त्रयाणामप्ययं साक्षाद्दत्तस्तु भगवान्स्वयम् । श्रुत्यन्विष्टाङ्घ्र्यब्जरेणुः सच्चिदानन्दविग्रहः ।।४२।।**
**सदेष्टयोगसंविद्दः स्मर्तृगामी क्षणे क्षणे । चण्डोऽप्यन्योऽनुग्रहाशीश्चन्द्रो जननवर्धनः ।।४३।।**

अर्थ+वित् मुनिः तेभ्यः बालेभ्यः पृथक् नामानि ददौ। स्वयं भगवान्, 'अहं मया पूर्णत्वेन ते दत्तं' इति उक्तवान्।४०। एनं मुनिः नाम्ना दत्तं चकार। सः ब्रह्म+अंशं चन्दनात् चन्द्र तथा औग्रं दुर्वाससम् (नाम्ना चकार)।४१। त्रयाणां अपि दत्तः तु स्वयं श्रुति+अन्विष्ट+अङ्घ्रि+अब्ज+रेणुः सत्+चित्+आनन्द+विग्रहः साक्षात् स्वयं भगवान्।४२। सदा इष्ट+योग+संवित्+दः क्षणे क्षणे स्मर्तृगामी। अन्यः चण्डः अपि अनुग्रह+आशीः। चन्द्रः जनन+वर्धनः।४३।

नंतर शब्दांचे अर्थ जाणणाऱ्या त्या अत्रिमुनींनी त्या बालकांना त्यांच्या त्यांच्या गुणांची द्योतक अशी नावे दिली. 'मी सर्वांशाने तुला दिले आहे **(दत्तम्)**' असे म्हणणाऱ्या विष्णूंच्या अंशाला त्यांनी **दत्त** असेच नाव दिले. '*दत्तात्मा तु स्वयं दत्त*' असे याज्ञवल्क्यस्मृतीचे वचन आहे (व्यवहाराध्याय श्लोक १३१). अशीच शुनःशेपाला विश्वामित्राने दत्तक घेतल्याची गोष्ट आहे. पण तिथे शुनःशेपाचा पहिला जनक पिता होता त्यामुळे त्याला *'कृत्रिम वैश्वामित्र'* असे म्हणतात. हे दोन पित्यांचे *'द्व्यामुष्यायण'* दत्ताच्या ठिकाणी लागू होत नाही. कारण भगवान विष्णूंचा आधी कुणी पिता नव्हता. तसेच गोत्रप्रवरादि अस्तित्वातच नव्हते. ब्रह्मादेवाच्या अंशाला त्याच्या आल्हादकतेमुळे **(चंदन)** चंद्र असे नामाभिधान केले. तसेच उग्रस्वभावाच्या भगवान शंकाराच्या अंशाला **दुर्वास** असे नाव दिले.४०-४१. ह्या तिघांतही स्वतः दत्त, ज्याच्या पदकमलाच्या परागकणांचा श्रुति निरंतर शोध घेताहेत (पण ज्याना ते अजून सांपडले नाहीत) असा सच्चिदानंदस्वरूप साक्षात् परमेश्वर आहे. पदकमलाचे परागकण या शब्दाने जगताच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा निर्देश आहे, हे परब्रह्माचे *'तटस्थलक्षण'* आहे. सत्, चित् आणि आनंद यांनी परब्रह्माचे *'स्वरूपलक्षण'* सुचविले आहे. हा दत्त सदैव अभीष्ट, अष्टांगयोग आणि ज्ञान यांचा दाता आहे आणि स्मरताक्षणी दर्शन देणारा आहे. दुर्वासमुनि रागीट स्वभावाचे असले तरी इतरांवर अनुग्रह करण्याचाच त्यांचा स्वभाव आहे. आणि चंद्र वंशवर्धक तसाच लोकांचे पोषण करणारा आहे.४२-४३.

**दुर्वासःशापमाश्रुत्य भूदेवार्थमनन्तशः । धृत्वावतारान्कार्यान्ते लीलाकायान्जहात्यजः ।।४४।।**
**परानुग्रहकार्यार्थमवतीर्णः स्वयं किल । दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वान्नामुमत्यजत् ।।४५।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कुतो दुर्वाससा शप्तः शापोऽव्यक्ते कथं वद । लग्नः परावरेऽमुं मे संशयं छेत्तुमर्हसि ।।४६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्ताधीनतया त्वेष भगवान् भक्तिभावनः । अव्यक्तोऽप्यस्ति सुव्यक्तः पूर्णाऽतोऽत्र सहिष्णुता ।।४७।।**

दुर्वासः शापं आश्रुत्य, अजः भू+देव+अर्थं अनन्तशः अवतारान् धृत्वा कार्य+अन्ते लीला+कायान् जहाति। पर+अनुग्रह+कार्य+अर्थं स्वयं किल अवतीर्णः। दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वात् अमुं न अत्यजत्।४४-४५। नामधारक उवाच। कुतो दुर्वाससा शप्तः? अव्यक्ते परावरे शापः कथं लग्नः? अमुं मे संशयं छेत्तुं अर्हसि।४६। एष भक्ति+भावनः भगवान् भक्त+अधीनतया अव्यक्तः अपि सुव्यक्तः अस्ति। अतः अत्र पूर्णा सहिष्णुता।४७।

दुर्वासमुनींच्या शापाचा अंगीकार करून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठी आणि देवांच्या कार्यासाठी हा अजन्मा अपरिमित अवतार धारण करतो आणि ती ती कार्ये झाल्यावर त्या त्या लीलाविग्रहांचे विसर्जन करतो. मात्र इतरांच्या अनुग्रहासाठी - मुमुक्षूंना मोक्षाची वाट दाखविण्यासाठी, भगवान विष्णूंनी स्वतः धारण केलेल्या ह्या दत्तावताराचे कार्य मात्र नित्य - न संपणारे असल्याने तो चिन्मय देह मात्र त्यांनी टाकलेला नाही.४४-४५. नामधारक प्रश्न करतात की 'ह्या कोणत्याही लक्षणानी अभिव्यक्तीला न येणाऱ्या आणि ब्रह्मादिकसुद्धा ज्याच्याहून निकृष्ट आहेत अशा परमात्म्याला दुर्वासांचा शाप लागला कसा हा माझा संशय आपणच फेडूं शकतां.'४६. सिद्ध म्हणाले, 'हा भगवान भक्तांच्या अधीन आहे. त्यामुळे वस्तुतः अव्यक्त असलेला हा भगवंत दया, क्षमा, शांती इत्यादि सर्व लक्षणे धारण करून व्यक्त होतो. त्यामुळेच भक्तवात्सल्याने त्याच्यात पूर्ण सहिष्णुता असते. भक्तांचे सर्व अपराध तो पोटात घेतो. प्रसंगी भक्ताचे क्लेश स्वतःवर घेतो पण त्यांना त्यांची झळ लागूं देत नाही.'४७.

**पुराम्बरीषनामैको भक्तो भागवतोत्तमः । एकादशीव्रतपर आसीदभ्यागतार्चकः ॥४८॥**
**एकदा व्रतभङ्गाय पारणाहे तदालयम् । चण्डः प्राप्याह दुर्वासा भोजनं मेऽर्पयेति च ॥४९॥**
**दास्यामीत्युक्तवत्यस्मिन्गत्वा स्नातुं नदीमरम् । छिद्रान्वेषी तत्र तस्थौ तरितुं पारणाक्षणम् ॥५०॥**
**सोऽप्यभुक्ते मुनौ भोज्यं नान्यथा व्रतभङ्गभीः । तीर्थात्तूभयसिद्धिर्म इति मत्वा पपौ जलम् ॥५१॥**

पुरा अम्बरीष नाम एकः भागवत+उत्तमः एकादशी+व्रत+पर अभ्यागत+अर्चकः आसीत्।४८। एकदा चण्डः दुर्वासा पारणा+अहे व्रत+भङ्गाय तत्+आलये प्राप्य च आह, 'मे भोजनं अर्पय' इति।४९। अस्मिन् 'दास्यामि' इति उक्तवत् स्नातुं अरं नदीं गत्वा छिद्र+अन्वेषी तत्र पारणा+क्षणं तरितुं तस्थौ।५०। सः, 'मुनौ अभुक्ते न भोज्यं, अन्यथा व्रत+भङ्ग+भीः, तीर्थात् तु मे उभय+सिद्धिः' इति मत्वा जलं पपौ।५१।

पूर्वी अम्बरीष नांवाचा एक राजर्षि उत्तम भागवत (भगवद्भक्त) होता. आपल्या अंतरांत आणि सर्व भूतमात्रांत भगवंताचे दर्शन करणारा आणि आपल्यासह सर्व चराचर भगवंताच्या ठायीं आहे असे पाहणारा भागवतोत्तम होय. (*'सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः। भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः॥'* श्रीमद्भागवत ११:२:४५) तो निष्ठेने एकादशीव्रत करीत असे. दशमीला एकभुक्त राहून संकल्प करायचा, एकादशीला पूर्ण दिवसभर उपोषण करायचे आणि द्वादशीला नियत वेळेला पारणा करून पुनः उरलेल्या दिवसभर उपोषण करायचे असे ते व्रत. असे तीन दिवसांचे व्रत तो करीत असे. तसाच त्याचा घरी आलेल्या अतिथीला जेवण घालण्याचाही नियम होता.४८. एकदा त्याच्या व्रताचा भंग करण्याच्या हेतूने संतापी दुर्वासमुनी द्वादशीच्या दिवशी पारण्याला मुहूर्तभर (दिवसाचा ३०वा भाग; ४८ मिनिटे) असतांना आले आणि त्यांनी भोजनाची मागणी केली.४९. अम्बरीषाने ते मान्य केल्यावर ते स्नानासाठी नदीवर गेले. तिथे मुद्दामच पारण्याची वेळ टळावी ह्या हेतूनेच अंबरीषाच्या व्रतातील न्यून (छिद्र) शोधणाऱ्या ऋषींनी हत्तीप्रमाणे स्नान करीत विलंब केला.५०. इकडे मुनींना सोडून जेवता येत नाही आणि पारण्याचा मुहूर्तही चुकूं नये अशा शृंगापत्तीत सांपडलेल्या अंबरीषाने फक्त तीर्थजल प्राशन केले.५१.

**तदैत्याह मुनिः पीतं हित्वा मां क्षुधितं यतः। दुर्भगानेन दोषेण भ्रमिष्यसि भवे भवे ।।५२।।**
**इत्युक्तः सोऽप्यजं भीतो दध्यौ स्वकुलदैवतम् । स्वदासजीवनं विष्णुं सोप्यागत्याह तं मुनिम् ।।५३।।**
**मुने मोघं न ते वाक्यं शापं देहि तमेव मे । नायं सोढुं प्रभुर्भक्त-वात्सल्यान्मे सहिष्णुता ।।५४।।**

तदा मुनिः एत्य आह, '(हे) दुर्भग यतः मां क्षुधितं हित्वा पीतं, अनेन दोषेण भवे भवे भ्रमिष्यसि।'।५२। इति उक्तः सः अपि भीतः स्वकुलदैवतं अजं दध्यौ। स्वदासजीवनं विष्णुः सः अपि आगत्य तं मुनिं आह।५३। '(हे) मुने ते वाक्यं मोघं न। तं एव शापं मे देहि। अयं न सोढुं, मे भक्त+वात्सल्यात् सहिष्णुता।'।५४।

त्याच वेळी नदीहून परतलेल्या मुनींनी ते ओळखून त्याला शाप दिला. 'अरे करंट्या, मला उपाशी ठेवून जेवलास त्या पापाने तू पुनःपुन्हा विविध योनीत (मत्स्य, कूर्म, वराह, सिंह इत्यादि) जन्म घेऊन फिरत राहशील.' इथे कठोपनिषदातील मंत्राचा (१.१.८) निर्देश महाराजांनी केला आहे. ज्याच्या घरून ब्राह्मण उपाशी जातो असा दुर्बुद्ध, आपल्या आशा-अपेक्षा, सत्संग आणि आनंद, इष्टपूर्तादि पुण्यांचे फळ या सर्वांना मुकतो. यासाठी कोणत्याही परिस्थितीत अतिथीची उपेक्षा करू नये हाच या मंत्राचा भावार्थ आहे.५२. ह्या शापाने आता आपण पशुयोनीत गेल्याने आपल्याला भगवंताचे स्मरण राहणार नाही ह्या भयाने कासावीस झालेल्या त्या भागवतोत्तमाने आपले कुलदैवत भगवान विष्णू यांचे ध्यान केले. श्रीहरीही तत्क्षणी तिथे प्रकट झाले आणि दुर्वास ऋषींना म्हणाले,५३. 'ऋषि महाराज, आपल्या तपाच्या सामर्थ्याने आणि आपण सत्यसंकल्प असल्याने आपले वचन कधीच वाया जाणार नाही. पण हा एवढा भयंकर शाप ह्या माझ्या भक्ताला सोसणार नाही. अहो, हा तर मलाही सहन करणे दुरापास्त आहे; पण भक्तवात्सल्याने मी तो सोशीन. तेव्हां आपण तो शाप मलाच द्यावा.'५४.

**इत्याकर्ण्य मुनिर्मत्वा भुव्ययं दुर्लभो नृणाम् । अम्बरीषप्रभावेण शापसम्बन्धकारणात् ।।५५।।**
**भविष्यत्यत्र सुलभस्तच्छपाम्येनमित्यसौ । तं शशापाप्यजः शापाद् बहुधावतरत्यजः ।।५६।।**

इति आकर्ण्य मुनिः 'अयं भुवि नृणां दुर्लभः। अम्बरीष+प्रभावेण शाप+संबन्ध+कारणात् अत्र सुलभः भविष्यति। तत् एनं शपामि।' इति मत्वा असौ तं शशाप। अजः शापात् बहुधा अवतरति।५५-५६।

हे ऐकून दुर्वासांनी 'हा भूलोकातील मानवांना तपादि कठीण उपायांनीसुद्धा भेटत नाही. अंबरीषाच्या भक्तीसाठी आणि शापाच्या निमित्ताने हा ह्या भूलोकी सुलभ होईल. तरी मी यालाच हा शाप देतो,' असा विचार करून भगवंताला शाप दिला. आणि जन्मादि विकारांच्या अतीत असूनही नारायणाने मत्स्य, कूर्म इत्यादि रूपांनी पृथ्वीवर अवतार धारण केले.

विष्णूचे मत्स्यादि अवतार पुराणांतून वर्णिलेले आहेत.

१. चैत्र शुक्ल तृतीयेच्या अपराह्ण (माध्याह्नोत्तर) काळी मत्स्य रूपाने अवतरून समुद्रात बुडलेले वेद वर काढून मनूचे रक्षण केले.

२. वैशाखी पौर्णिमेला सायंकाळी कासवाचे रूप घेऊन समुद्रमंथनासाठी मंदार पर्वत पाठीवर घेतला. ३.

भाद्रपद शुक्ल तृतीयेच्या अपराह्णी वराहरूपाने समुद्रांतून पृथ्वी वर काढून हिरण्याक्षाचा संहार केला.

४. वैशाख शुक्ल चतुर्दशीला नरसिंहरूपाने अवतरून हिरण्यकश्यपूचा नाश केला.

५. भाद्रपद शुद्ध द्वादशीला माध्याह्नकाली वामनाचे रूप घेऊन कपटाने असुरराज बलीचे बंधन केले.

**अस्यावतारा मत्स्याद्याः पुराणोक्ता हि विश्रुताः । द्विवारमाविरासीत्स दीनान्त्रातुं जनान् कलौ ।।५७।।**
**अद्यापि तौ कामदौ स्तः पामरागोचरौ कलौ । यतकालकलौ द्राक्शं सिद्ध्येन्नान्यदतोऽवितः ।।५८।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

अस्य मत्स्य आदि पुराण+उक्ताः अवताराः हि विश्रुताः। कलौ दीनान् जनान् त्रातुं द्विवारं आविरासीत्।५७। कलौ पामर+अगोचरौ तौ कामदौ अद्यापि स्तः। यत+काल+कलौ शं द्राक् सिद्ध्येत् न अन्यत्। अतः (सः कलिः।) अवितः।५८।

६. वैशाख शुक्ल तृतीयेच्या माध्याह्नकाली कार्तवीर्यादि क्षत्रियांचा संहार करण्यासाठी परशुराम भार्गवाचा अवतार घेतला.

७. चैत्र शुक्ल नवमीला दशरथाच्या पोटी रामाचा अवतार घेऊन रावणाचा कुळासहित नाश केला. ८.

श्रावण कृष्ण अष्टमीला मध्यरात्री अवतरून श्रीकृष्णाने भूमीचा भार हलका केला. ९. आश्विन शुक्ल दशमीला बुद्धाचा अवतार घेऊन कारुण्याचा प्रसार केला. १०. श्रावण शुक्ल षष्ठीला कल्कीचा जन्म होईल आणि तो म्लेच्छांचा नाश करील. हे दहा अवतार होत.५५-५६. कलियुगांत झालेल्या अवतारांविषयी पुढच्या श्लोकांत सांगितले आहे.

मार्गशीर्ष पौर्णिमेला प्रदोषकाळी बुधवारी मृगनक्षत्रावर श्रीदत्तात्रेयांचा अवतार आजही गाजतो आहे. ह्या दत्तप्रभूंचेच श्रीपाद आणि नरहरि या नांवांचे दोन अवतार कलियुगांतील दीनदुबळ्यांच्या उद्धारासाठी झाले आहेत. पामरांना दिसत नसले तरी ते आजही ते भक्तांच्या कामना पूर्ण करीत विद्यमान आहेत.

(तर मग ते सकल दोषांनी भरलेल्या या क्रूर कलीचा नाश का करीत नाहीत ही शंका अपेक्षून सांगत आहेत.)

ब्रह्मदेवाच्या योजनेने त्याला नेमून दिलेल्या काळाचा विचार करून आणि त्या युगांत पुण्याचा लाभ सुलभ आणि लवकर (केवळ संकल्पाने) होत असल्याने तसेच संकल्पाने पाप मात्र लागत नसल्याने तो कितीही दुष्ट असला तरी त्याला राखला आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तिसरा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## || अध्याय ४ ||

### || यदुरुवाच ||

**श्र्यायुःकीर्त्यृद्धिहेतुर्ना न्नर्थसक्तोऽन्यथा भवान् । कल्पः स्वङ्गो ज्ञोऽप्यकर्ता कुतोऽत्रातृट् समुत्विति ||१||**

ना श्री+आयुः+कीर्ति+ऋद्धि+हेतुः नृ+अर्थ+सक्तः। भवान् अन्यथा। कल्पः सु+अङ्गः ज्ञः अपि अकर्ता, अतृट्, अत्र कुतः समुत् इति।१।

(श्रीगुरुचरित्राला अभिप्रेत दत्तसंप्रदायाची मूलतत्त्वे विस्ताराने मांडून त्याची सांगड श्रीमद्भागवत संप्रदायाशी घालण्याचे कार्यही श्रीस्वामिमहाराजांनी प्रस्तुत ग्रंथाद्वारे केले आहे. त्यासाठी आवश्यक तेथे श्रीगुरुचरित्रात नसलेल्या विषयांचा समावेश त्यांनी ह्या द्विसाहस्री गुरुचरितम् ग्रंथात केला आहे. अर्थात् हे विषय आगंतुक आहेत ही जाणीव असल्याने त्या त्या ठिकाणी त्या लोकांना त्यांनी 'क्षेपक' म्हटले आहे. हा संपूर्ण चौथा अध्याय मूळ गुरुचरित्रात नाही. त्यामुळे त्यांनी त्याला क्षेपकोऽध्यायः असे म्हटले आहे. मूळ गुरुचरित्रात श्रीदत्तजन्माची कथा सोडून इतर दत्तचरित्राचा फारसा उल्लेख आढळत नाही. श्रीगुरु नृसिंहसरस्वतींना त्रयमूर्ति असे विशेषण गुरुचरित्रात बऱ्याच ठिकाणी लावले आहे तेवढेच.

दत्तावताराच्या कार्याची, तत्त्वज्ञानाची आणि उपासनापद्धतीची संगती गुरुचरित्रातील प्रतिपादनाशी लावून त्याला बळकटी देण्याचे कार्य प.प. श्रीटेंबेस्वामिमहाराजांनीच प्रथम केले आहे. द्विसाहस्रीतील हा चौथा क्षेपक अध्याय त्या कार्याला पायाभूत आहे. ह्या अध्यायांतील ३ ते ४० हे ३८ लोक जसेच्या तसे श्रीदत्तपुराणात (६:५:९-४६) आणि श्रीदत्तात्रेयषोडषावतारचरित्रात (१५:८-४५) दिले आहेत. ह्या ३८ लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणाच्या टीकेत **'श्रीअवधूतगीता'** असे नांव दिले आहे. ह्या आख्यानावर श्रीमद्भागवतांतील एकादश स्कंधांतील ७व्या अध्यायातील यदु-अवधूत संवादाची छाप स्पष्टपणे दिसून येते. - अनुवादक)

**श्रीदत्तो यदुना पृष्टस्तं पुंसां श्रेयसेऽब्रवीत् । परं ध्युपाश्रितगुरु-शिक्षितज्ञानमात्मनः ।।२।।**

श्रीदत्तः यदुना पृष्टः तं पुंसां श्रेयसे आत्मनः परं धी+उपाश्रित+गुरु+शिक्षित+ज्ञानं अब्रवीत्।२।

श्रीगणेशाय नमः। चतुर्थाध्याय. आत्मविद्येचे निरूपण करण्यासाठी त्याला पुष्टी देणारे असे ब्रह्मज्ञानाचे उपदेशात्मक उपाख्यान ह्या अध्यायात सांगितले आहे. हे ब्रह्मसूत्रातील पारिप्लवाधिकरणाला (११:४:२३) अनुसरूनच आहे. उपनिषदांत याज्ञवल्क्य-मैत्रेयी, प्रतर्दन, जनश्रुति इत्यादींच्या अनेक कथा (उपाख्याने) सांगितल्या आहेत. ह्यासंबधी कुणी असे म्हणेल की ह्या अश्वमेधादि यज्ञात ऋत्विजांनी यजमानाला मधूनमधून कांही कथा सांगण्याचे विधान आहे. ह्या कथा केवळ त्या विधीचा भाग म्हणजे उपचारात्मक असतात. त्याला परिप्लव म्हणतात. त्याचप्रमाणे उपनिषदात आलेल्या ह्या गोष्टी औपचारिक मानायच्या काय? असा प्रश्न (पूर्वपक्ष) उपस्थित करून ह्या अधिकरणात त्याचे नकारार्थी उत्तर दिले आहे. पुढे असे स्पष्ट केले आहे की या कथा आत्मविद्येच्या प्रतिपादनाशी संबंधित असून त्याचा अंगभूत घटक आहेत. श्रीस्वामिमहाराजांना इथे हे सुचवायचे आहे की यदु आणि अवधूत यांची ही कथाही ह्या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय जो आत्मज्ञान त्याचाच परिपोष करीत आहेत. पर्यायाने श्रीगुरुचरित्रात आलेल्या सर्वच गोष्टी आत्मज्ञानाच्या उपदेशाचाच भाग आहेत असे सुचविले आहे. त्यांच्याकडे केवळ कांही प्रसंगोपात्त कथा असे न पाहता त्यांतील निर्दिष्ट तत्त्वज्ञानाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. **चोवीस गुरूंकडून शिकलेले ज्ञान। यदुराया अवधूत निरूपी जाण। तेवींच प्रल्हाद आणि अर्जुन। बोधिले अनसूयानंदने।।४।।** पित्याच्या शापाने वडिलोपार्जित राज्यापासून वंचित झालेला ययातिपुत्र यदु विरक्त होऊन वनांत संचार करीत असतां त्याने एका निर्मनुष्य स्थानी एका सर्वसंगपरित्याग केलेल्या, एका ब्राह्मण अवधूताला भूमीवर झोपलेले पाहिले. तिथे निश्चिंत, भयरहित आणि तरीही सावध (अंतर्मुख) अशा त्या अवधूताला पाहून यदुने आश्चर्याने त्याला प्रश्न केला.

**न दैवानुगभूतार्तः क्ष्मेव धीरः सृतेश्चलेत् । सदा परार्थोद्भवेहो नगाच्छिक्षेत्परात्मताम् ।।३।।**

दैव+अनुग+भूत+आर्तः क्ष्मा+इव धीरः सृतेः न चलेत्। पर+अर्थ+उद्भवः नगात् परात्मतां शिक्षेत्।३।

'महाराज! साधारणतः मानवाची प्रवृत्ती संपत्ती, आयुष्य, कीर्ती यांच्या समृद्धीसाठी धर्म, अर्थ, काम आदि पुरुषार्थाकडे असते. आपल्याला मात्र ह्या कशाचीही इच्छा दिसत नाही. तसेच आपण धर्मादि पुरुषार्थाविषयी उदासीन आहां. आपण धडधाकट, ज्ञानी आणि हुषार दिसता. तेव्हा आपल्यात कर्तृत्वच नाही असेही नाही. आपण निरिच्छपणे, पत्नी, पुत्र इत्यादि कांहीच संसार नसूनही पूर्ण आनंदात इथे पहुडलेले दिसतां. हे कसे काय?'

ययातिपुत्र यदूचा हा प्रन ऐकून श्रीदत्तप्रभूंनी आपल्याच बुद्धीने स्वीकारलेल्या चोवीस गुरूंपासून प्राप्त केलेले हेय आणि उपादेय - म्हणजेच त्याज्य आणि ग्राह्य असे दोन्ही प्रकारचे भ्रम आणि प्रमाद यांचा निरास करणारे उत्कृष्ट ज्ञान मानवांच्या उद्धारासाठी सांगायला आरंभ केला. *'सन्ति मे गुरवो राजन् बहवो बद्ध्युपाश्रिताः। यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु।।'* (भा.पु. ११:७:३२)

**१. पृथ्वी -** त्यांतही तितिक्षेचे परमार्थमार्गातील प्राधान्य लक्षात घेऊन आधी पृथ्वीपासून घेतलेली शिकवण सांगतात. आपापल्या कर्माला अनुसरून पृथ्वीवर वावरणारे जीव तिच्यावर सतत आघात करीत असतात; खणणे, नांगरणे, मलमूत्रादि विसर्जणे, पायाने तुडविणे इत्यादि नानाप्रकारे तिला सतत हे सर्व प्राणीमात्र त्रस्त करीत असतात. पण पृथ्वी मात्र त्या सर्वांना आधार देत आपल्या मार्गावर अविचल राहते. 'हे सर्व जीव आपापल्या दैवाप्रमाणे घडलेले आहेत आणि त्याचप्रमाणे ते वागतात. तेव्हां कुणाला काय म्हणून दोष द्यावा?' असा विचार ती करते. पृथ्वीपासून हे धैर्य आणि क्षमाशीलता मी शिकलो आहे. शास्त्रांत तीन प्रकारचे प्रारब्ध सांगितले आहे. स्वेच्छा प्रारब्ध, परेच्छा प्रारब्ध आणि अनिच्छा प्रारब्ध. यापैकी कोणत्याही प्रकारे समोर येणारे प्रारब्ध हे आपलेच कर्म आहे असा विचार करून कुणावरही राग धरू नये.

**प्राणवृत्त्याक्षिप्तहृद्वाग्विद्भृत्तुष्येन्न गोप्रियैः । तद्भुग्दोषगुणास्पृग्वि-धर्मासक्तच देहगः ।।४।।**

वित्+भृत् प्राणवृत्त्या अक्षिप्त+हृत्+वाक् तुष्येत्, न गो+प्रियैः। देह+गः तत्+भुक् वि+धर्म+असक्तः दोष+गुण+अस्पृक् गुण+आश्रयः स्वदृक्, गन्धैः वायुवत् गुणैः न युज्येत्।४।

**नग** पृथ्वीचेच अंगभूत असे जे पर्वत किंवा वृक्ष, त्यांच्यापासून इतरांच्या सुखासाठीच सर्वस्व वेंचायला मी शिकलो. **पर्वत** आणि वृक्ष यांची उत्पत्तीच जणू परोपकारासाठी झालेली असते. पर्वत आपली माती, जल, खनिज, रत्नादि संपत्ती इतरांसाठीच देतात. त्याचप्रमाणे **वृक्ष**ही त्यांना लावणारा, तोडणारा, अथवा उपटून टाकणारा असा जो कोणी त्यांचा आश्रय घेतो त्याला आपली पाने फुले, फळे, छाया आणि लाकूडसुद्धा निरपेक्षपणे अर्पण करतात. (जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयाने केली। दोघां एकचि साउली। वृक्ष दे जैसा।। ज्ञानेश्वरी १३:१९९). *'भूतैराक्रम्यमाणोऽपि, धीरो दैववाशनुगैः। तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम्।। शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः। साधुः शिक्षेत भूभृत्तौ, नगशिष्यः परात्मताम्।।'* भा.पु. ११:७:३७-३८.

**२. वायू -** क्षमाशील मनुष्याला आंतरिक शांती लाभते हे खरे असले तरी मनाला विषयांची ओढ असेल तर ते बहिर्मुख होण्याचीच शक्यता आहे. चित्ताला अंतर्मुखता येण्यासाठी देहाच्या आंतील आणि बाहेरील वायूपासून घेतलेले विषयांसंबंधी अनासक्तीचे शिक्षण सांगतात. शरीरांतील प्राणवायू जसा चव-बेचव असा विचार न करता जे अन्न मिळेल त्यावर निर्वाह करतो त्याचप्रमाणे शहाण्या माणसानेही मिळेल त्या आहाराने समाधान मानून रुचीकडे लक्ष देऊं नये. जिभेचे चोचले पुरवण्याची धडपड करून मनाचा क्षोभ होऊ देऊ नये. प्राणवृत्तीचा अवलंब करून आहार घेतला नाही तर मनाला विकलता येईल आणि ज्ञान टिकवता येणार नाही; रुचीचा आग्रह धरला तर मन आणि वाचा अशांत होतील. (*'प्राणवृत्त्यैव संतुष्येन्मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः। ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः।।'* भा.पु. ११:७:३९।।)

**गुणाश्रयो गुणैर्युज्येत्र गन्धैर्वायुवत्स्वदृक् । कालोत्थगुणतेजोऽब्भू-मयभावास्पृगित्पुमान् ।।५।।**
**वायूत्थाब्दास्पृक्खवच्चान्तःस्थेनाभिदसङ्गती । भाव्ये सर्वान्वयव्याप्त्या ब्रह्मात्मत्वात्ततात्मनः ।।६।।**

पुमान् वायु+उत्थ+अब्द+अस्पृक् काल+उत्थ+गुण+तेजः+अप्+भूमय+अस्पृक ख+वत्। आत्मनः सर्व+अन्वय+व्याप्त्या ब्रह्म+आत्मत्वात् अन्तःस्थेन अभित्+असङ्गती भाव्ये।६।

बाह्य वायू जसा सर्वत्र संचार करीत असतां सुगंधी उपवनांतून वा दुर्गंधयुक्त उकिरड्यावरून, हिमाच्छादित पर्वतराजीवरून वा धगधगणाऱ्या आगीतून जात असता त्यांचे सुगंध-दुर्गंध, शीतलता-उष्णता हे विविध धर्म स्वतःला फार काळ चिकटू देत नाही, त्याचप्रमाणे योगी प्राप्त विषयांचा भोग घेऊनही त्यांच्याविषयी आसक्ती ठेवीत नाही. (*'विषयेश्वाविशन्योगी नानाधर्मेषु वर्ततः। गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत्।।'* भा.पु.११:७:४०।।)

ह्या स्थूल देहात राहून तेथे विषयांचा उपभोग घेतांना जरी तो योगी दिसला तरी गंधादीपासून अलिप्त असणाऱ्या वायूसारखा अनासक्त राहतो. *'पार्थिवेष्विव देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः। गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक्।।'* भा.पु. ११:७:४१. हे असे कसे होईल ह्या प्रनाचे उत्तर दिले आहे. **स्व** म्हणजे आत्मा त्याच्यावर दृष्टी (दृक्) लावून म्हणजे आत्मानुसंधानाने हे शक्य होते.

**३. आकाश -** अशा आत्मचिंतनशीलाचेही चित्त निर्विकार, व्यापक अशा आत्म्याचे ज्ञान नसेल तर स्वस्थ राहणार नाही. त्यासाठी आकाशापासून घेतलेला धडा श्लोकाच्या उत्तरार्धात सांगितला आहे. काळाने निर्माण केलेले वायू, तेज, जल यांच्या मिश्रणाने झालेल्या मेघांनी जसे आकाश लिप्त होत नाही तसा ज्ञानी पुरुषाला पंचीकृत भूतांपासून झालेल्या देहाच्या विकारांचा स्पर्शही होत नाही. *'तेजोऽब्वन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः। न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान्।।'* भा.पु. ११:७:४३.

**रस्यः स्निग्धः प्रकृत्याच्छो ज्ञोऽब्वद्धाम्ना पुनाति नॄन् ।**
**छन्नः स्पष्टोऽपि काम्यर्च्यः प्रागुदग्दात्रघं दहन् ।।७।।**
**क्वापि भुङ्क्ते तपस्तेजो-दीप्तोऽक्षोभ्योऽपरिग्रहः । मलास्पृक्सर्वभक्षोऽपि ज्ञोऽग्निवच्चेन्धसीयते ।।८।।**
**तत्तद्रूपः स्वमायोत्थोच्चासत्स्थेशोऽग्निहेतिवत् । कालान्नित्येऽपि दृश्येते नात्मभूतोद्भवक्षती ।।९।।**

रस्यः स्निग्धः प्रकृत्या अच्छः अप्+वत् ज्ञः नॄन् पुनाति। अग्निवत् छन्नः स्पष्टः अपि प्राक् उदक् दातृ+अघं दहन् कामी+अर्च्यः।७। अक्षोभ्यः अपरिग्रहः मल+अस्पृक् क्व अपि भुङ्क्ते। सर्व+भक्षः अपि ज्ञः तपः+तेजः+दीप्तः। इन्धसि इयते । स्व+माया+उत्थ+उच्च+असत्+स्थः ईशः च (तत्तत्रूपः इयते)। कालात् नित्ये अपि आत्म+भूत+उद्भव+क्षती न दृश्येते।८-९।

आणखी घटाकाश, मठाकाश इत्यादी वेगवेगळ्या स्वरूपांत भासले तरी आकाश सर्वव्यापी असल्याने घटादिकांनी ते भिन्न होत नाही किंवा त्यांच्याशी आकाशाचा संबंध नसतो. घटादिकांच्या फुटण्याने आकाशाला काहीच हानी पोंचत नाही. त्याचप्रमाणे देहस्थ प्रत्यगात्मा सर्वव्यापी असल्याने आणि ब्रह्मस्वरूपच असल्याने त्याचा देहादिकांशी संबंध नसतो किंवा त्यांच्यामुळे त्याचे भेदही होत नाहीत. श्रीस्वामिमहाराज आकाशाची व्यापकता माळेतील मण्यांत असलेल्या दोऱ्याच्या व्यापकतेपेक्षा वेगळी असल्याचे स्पष्ट करतात. दोरा मण्यापासून वेगळा करता येतो. आकाश मात्र वेगळे होत नाही. सर्व चराचरांना ते अंतर्बाह्य व्यापून असते. सर्व चराचरांच्या अंतर्बाह्य स्थित असून विच्छिन्न न होता, सर्वांशी समन्वय करूनही निर्लिप्त राहण्याची शिकवण आकाशाकडून घ्यावी हा अभिप्राय. *'अंतर्हितश्च स्थिरजङ्गमेषु ब्रह्मात्वभावेन समन्वयेन। व्याप्त्याऽवच्छेदमसङ्गमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत्।।'* भा.पु. ११:७:४२.

**४. उदक -** ज्ञानी जलाप्रमाणे, मधुर(भाषी), लाघवी आणि स्वभावतः स्वच्छ असतो. पाण्यासारखाच आपल्या दर्शनाने, स्पर्शाने आणि सेवनाने लोकांच्या काया आणि मने पवित्र करतो. *स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम्। मुनिः पुनत्यपां मित्रमीक्षोपस्पर्शकीर्तनैः।।'* भा.पु.११:७:४४. पुढील अडीच श्लोकात अग्नीपासून शिकलेले ज्ञान सांगतात.

**देहः कलावद्विकारी कालेनात्माब्जवद् ध्रुवः । भात्यात्मा तत्स्थद्व्यक्तौ न स्वस्थो बुध्यतेऽर्कवत् ।।१०।।**

देहः कालेन कला+वत् विकारी, आत्मा अब्ज+वत् ध्रुवः। अर्क+वत् आत्मा (स्थूल+बुद्ध्या) व्यक्तौ तत्स्थ+वत् भाति स्वस्थः न बुद्ध्यते।१०।

**५. अग्नि -** अग्नीसारखा योगी कधी गुप्त (राखेने झांकलेला) तर कधी स्पष्ट धगधगता, सकाम भक्तांची (होत्यांची) पूजा घेतो आणि दात्याची मागची-पुढची सगळी पापे जाळतो. *'क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्टः उपास्यः श्रेय इच्छिताम्। भुङ्क्ते सर्वत्र दातृणां दहन् प्रागुत्तराशुभम्।।'* भा.पु. ११:७:४६. अग्नीसारखाच सर्व भक्षण करूनही त्याला मळ (दोष) लागत नाही. तपाच्या तेजाने तो अग्नीसारखा प्रदीप्त असल्याने त्याला कोणत्याही कारणाने क्षोभ होत नाही. अग्नी जसा सर्व जाळून टाकून कांहीच शिल्लक ठेवीत नाही तसाच ज्ञानीही कशाचा संग्रह करीत नाही. अग्नी ज्या ज्या इंधनात प्रवेश करतो त्याचाच आकार घेतो. गोल लाकडाला जाळतांना तो गोल दिसतो तर चौकोनी ठोकळ्याला जाळतांना तो चौकोनी दिसेल. तसाच आत्मा आपल्याच मायेने निर्मिलेल्या देव, प्राणी, मनुष्य इत्यादी देहांत प्रविष्ट होऊन त्यांच्यासारखाच भासतो. पण त्याला स्वतःला कोणताही आकार नसतो. तसेच दिव्याची ज्योती नित्य नवी प्रकाशते आणि मालवते. असे असूनही तिची उत्पत्ती अथवा नाश स्थूल दृष्टीला दिसून येत नाही. ती सतत तेवतांनाच दिसते. तशीच सतत जन्मणाऱ्या आणि नष्ट होणाऱ्या नाशिवंत देहांची क्षणभंगुरता काळाच्या वेगाने माणसाला जाणवत नाही. *'स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः। प्रविष्ट ईयते तत्तत्सरूपोऽग्निरिवैन्धसि।।'* भा.पु. ११:७:४७. 'कालेन क्षोभवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ। नित्यावपि न दृयेते आत्मनोऽग्नेर्यथार्चिषाम्।।' भा.पु.११:७:४९.

**६ चंद्र -** जन्म, स्थिती, वाढ, परिणाम, झीज आणि नाश ह्या सहा विकार असलेल्या देहापासूनही आत्मा वेगळा आहे हे चंद्रापासून घेतलेले ज्ञान पहिल्या श्लोकार्धात सांगितले आहे. देह हा चंद्राच्या कलांप्रमाणे विकारशील आहे; आत्मा मात्र चंद्रासारखा अविकारी आहे. ज्योतिष्यशास्त्रानुसार सूर्य तेजाचा गोलक आहे तर ग्रह आणि नक्षत्रे जलाचे गोल आहेत.

**स्थूलबुद्ध्याऽर्कवद्गोभिर्-गा यथास्वं गुणैर्गुणान् । आदत्ते विसृजत्यत्र सदा योगी न युज्यते ।।११।।**

(स्थूलबुद्ध्या)। यथास्वं गोभिः गाः अर्कवत् योगी गुणैः गुणान् आदत्ते विसृजति सदा न युज्यते।११।

जलमय चंद्र आणि तेजोमय सूर्य जेव्हा एका नक्षत्रात असतात तेव्हा चंद्र सूर्याने झांकल्यामुळे डोळ्याना दिसत नाही. एका नक्षत्रापासून दुसऱ्या नक्षत्राला जायला चंद्राला साठ कला ओलांडाव्या सागतात तर सूर्याला तेरा दिवस आणि रात्री लागतात. म्हणजे (मानवाच्या दृष्टीने) चंद्राचा वेग सूर्याच्या १५ पट आहे. प्रतिपदेला सूर्याचा पंधरावा भागच चंद्राच्या जलांत प्रतिबिंबित होतो. पंधराव्या दिवशी चंद्र आणि सूर्य यांच्यातील अंतर १३ नक्षत्रांचे होते. म्हणजेच २७ नक्षत्रांच्या मंडलात चंद्र आणि सूर्य समांतर होऊन एकमेकांसमोर येतात. म्हणून त्या (पौर्णिमेच्या) दिवशी संपूर्ण सूर्याचे प्रतिबिंब, त्यावर पडलेल्या पृथ्वीच्या सांवलीसहित दिसते. अमावास्या धरून हे चक्र सोळा दिवसांचे होते आणि ह्या काळांत चंद्राचे प्रतिबिंब एकेका कलेने वाढते. अशा सोळा कला होतात. नंतर पुन्हा प्रतिपदेपासून चंद्र आणि सूर्य एकमेकांजवळ येतात आणि चंद्रात उमटणारे प्रतिबिंब एकेका कलेने कमी होत पुढच्या अमावास्येला दिसेनासे होते. ह्या सर्व प्रक्रियेत जलगोलक चंद्राचा आकार कमी-जास्ती होत नाही. तो विकार फक्त कलांचाच आहे. तसेच आत्म्याचे पण आहे. आत्मा देहस्थ भासत असला तरी देहाचे विकार त्याला स्पर्शत नाहीत. पुढच्या अर्ध्या श्लोकात सूर्यापासून काय शिकलो ते सांगतात. *'विसर्गाद्याः स्मशानान्ता भावा देहस्य नात्मनः। कलानामिव चन्द्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मनः।।४८।।'* भा.पु. ११:७:४८.

**७. सूर्य -** स्वतः भेदरहित असूनही तो स्वरूपात स्थित आहे हे न कळून अभिव्यक्त स्थूल देहात असल्यासारखा भासतो. जसा सूर्य स्वर्गात (आकाशात) अविचल असतो पण घागरीतील पाण्यात हलताना दिसतो तसा स्थूल देहाच्या विकारानी आत्मा विकृत झाल्यासारखा वाटतो. *'सूर्यो थिल्लरामाजी (डबक्यात) बिंबला। मूढ म्हणती थिल्लरी बुडाला। त्याचेनि कंपे कंपु मानिला। डहुळला म्हणता तो।।५१।। त्या थिल्लराते नातळतां। गगनीं अलिप्त जेवीं सविता। तैसीच योगियांची योग्यता। देहातीतता देहकर्मी।।५२।।'* ए. भागवत. अ. ७.

**नाऽतिस्नेहप्रसङ्गात्तो नश्येद्दीनः कपोतवत् । कश्चित्कपोतः कपोती क्रीडादौ चेरतुर्वने ॥१२॥**
**प्रेम्णाऽशङ्कं मिथोबद्धध्यक्षङ्गौ पाति स श्रमात् । तर्पयन्ती साऽसूतार्भांस्-तांस्तौ पुपुषतुर्मुदा ॥१३॥**

ना अति+स्नेह+प्रसंगात् दीनः कपोतवत् नश्येत्। कश्चित् कपोतः कपोती क्रीडा+आदौ प्रेम्णा अशङ्कं धी+अक्ष+अङ्गौ मिथः वने चेरतुः। सः श्रमात् तर्पयन्तीं कपोतीं पाति। सा अर्भान् असूत। तां तौ (च सः) मुदा पुपुषतुः।१२-१३।

योग्य वेळी सूर्य जसा आपल्या किरणांनी (***गोभिः***) पाणी (***गा***) शोषून घेतो आणि पावसाळ्यांत पुनः ते पाणी सोडतो, तसाच योगी त्या त्या वेळी इंद्रियांद्वारा (**गुणैः**) विषय (**गुणाः**) ग्रहण करतो आणि कालानुसार आणि पात्रानुसार ते विषय दुसऱ्यांना देतो. या दोन्ही क्रियांचा तो अभिमान बाळगीत नाही. *'गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विसृजति। न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपति॥'* भा.पु. ११:७:५०.

**८. कपोत-कपोती -** वरीलप्रमाणे देहातीततेचा अभ्यास केला तरी जर कोणाचाही अतिरिक्त स्नेह त्याच्या नाशालाच कारण होतो हे कपोतापासून घेतलेले हेयलक्षण शिक्षण चार श्लोकांत सांगतात. माणूस (**ना**) (स्त्रीपुत्रादिकांच्या) फारच प्रेमात अडकून त्यांचे कोड कौतुक करू जाईल तर तो पारव्यासारखा विवश होऊन नाश पावेल. एका वनात एक पारवा (कवडा) आणि त्याची मादी जोडीने आपली मने, दृष्टी आणि शरीरे (**धी, अक्षि, अंगौ**) एकमेकाशी गुंतवून (**मिथः**) निरतिशय प्रीतीने विहार करीत होते. हास्य, कटाक्ष आणि आलाप यांनी त्याला सुखविणाऱ्या त्या कपोतीला हवे ते कष्टाने देऊन तो कपोत तिचा सांभाळ करीत होता. यथाकाल त्या कपोतीने अंडी दिली आणि कालांतराने ती फुटून पिले बाहेर आली.

**कदाचिल्लुब्धको नीडाद् बहिःस्थांस्ताञ्छिचाददे । क्रोशन्तीं पतितां दुःखात्-तां तं चापस्मृतिं तथा ।।१४।।**
**द्वन्द्वारामः प्रियाऽशान्तो गृहासक्तो विवन्नरः । क्रान्तापावृतमुक्तिद्वार्-नृजन्मच्युत एव सः ।।१५।।**

कदाचित् लुब्धकः नीडात् बहिःस्थान् तान् शिचा आददे। तां दुःखात् पतितां तथा तं च अपस्मृतिं (लुब्धकः आददे)।१४।
द्वन्द्व+आरामः प्रिय+अशान्तः गृहा+आसक्तः नरः सः विवत् अपावृत+मुक्ति+द्वाः+नृ+जन्म+च्युत एव।१५।

त्यांच्यासाठी केलेल्या इवल्याशा घरटांत त्याना सुरक्षित ठेवून ते दोघे त्यांच्यासाठी चारा आणीत आणि त्यांच्या मुखांत घालीत. अशा रीतीने त्यांचे लालन-पालन होत असतांना ही पिले थोडी मोठी झाली आणि घरट्याच्या जवळपास खेळू लागली. आईवडील बाहेर चारा आणायला गेले असतांना याप्रमाणे तिथे खेळणारी पिले एका फांसेपारध्याने (**लुब्धकः**) टिपली. त्याने आपले जाळे (**शिचा**) लावून त्या पिलांना धरले आणि तो त्यांच्या मातापित्यांची वाट पाहू लागला. वनांतून परत आलेली कपोती, आपल्या पिलांची ती अवस्था पाहून दुःखातिशयाने चीत्कार करीत जाळ्यांत पडली. मागून येणाऱ्या कपोताने हे सर्व जाळ्यांत सांपडलेले पाहून हतबुद्ध आणि गलितगात्र झाला आणि त्यालाही त्या फांसेपारध्याने पकडले. (भागवतांत (११:७:५२-७३) हे कपोत-कपोतीचे गृहस्थाश्रमावरील रूपक अधिक विस्ताराने सांगितले आहे. एकनाथमहाराजांनीही ते सुंदररीत्या रंगविले आहे.)

असा दृष्टान्त मांडून झाल्यावर आतां तो दार्ष्टान्तिक जो पुरुष त्याला लावतात. द्वंद्वांत सुख शोधणारा, प्रिय विषयाच्या लालसेने अशान्त झालेला, घर हेच आनंदाचे धाम आहे अशा बुद्धीने त्यांत आसक्त झालेला पुरुष असाच काळाचे भक्ष्य होतो आणि जणूं मुक्तीचे उघडे दार, असा हा दुर्लभ नरजन्म कुटुम्बपोषणातच व्यर्थ गमावून बसतो. परिणामी हीनतर योनीत जन्म घेतो असा भावार्थ. (*'एवं कुटुम्ब्यशान्तात्मा, द्वन्द्वारामः पतत्रिवत्। पुष्णन्कुटुम्बं कृपणः सानुबन्धोऽवसीदति।।७३।। यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम्। गृहेषु खगवत्सक्तस्तमारूढच्युतं विदुः।।७४।।'* भा.पु. ११:७.)

**क्वाप्यस्त्यैन्द्रियसौख्यं तन्-नैच्छेदाजगरोऽक्रियः । यदृच्छयाप्तं महान्तं ग्रासं वाल्पं रसारसम् ।।१६।।**
**भक्षेच्चेन्नाप्तोऽनशनो दैवभुक्सर्पवत्स्वपन् । विनिद्रोऽक्रियबल्यङ्ग-धृग्गोमानपि नेहते ।।१७।।**

क्व अपि ऐन्द्रिय+सौख्यं आजगरः अक्रियः तत् न ऐच्छेत्। यदृच्छया आप्तं महान्तं वा अल्पं रस+अरसं ग्रासं भक्षेत्। न आप्तः चेत् अनशनः दैवभुक् स्वपन् विनिद्रः अक्रियः बली+अङ्ग+धृक् गो+मान् अपि न ईहते।१६-१७।

**९. अजगर -** हे समजून घेऊन अटळ प्रारब्ध कर्मानुसारच अर्थादिक सर्व प्राप्त होत असल्याने त्यासाठी व्यर्थ आयुष्य वायां दवडूं नये हा अजगरापासून शिकलेला धडा दोन श्लोकांत सांगितला आहे. इंद्रियांपासून होणारे सुख किंवा दुःख हे मनुष्य देहाप्रमाणेच पश्वादिक योनीत, नरकांत वा स्वर्गात कुठेही सारखेच असते. तेव्हां त्याचा सोस करण्यापेक्षां अजगराच्या वृत्तीने उदासीन राहावे. मग देहाचा निर्वाह कसा होईल असे म्हणाल तर आपल्या नशिबानुसार जो लहान, मोठा, कडू, गोड आहार कुणाची याचना न करता मिळेल तो घ्यावा. (*'ग्रासं सुमृष्टं विरसं, महान्तं स्तोकमेव वा। यदृच्छयैवाप्तं ग्रसेदाजगरोऽक्रियः।।'* भा.पु. ११:८:२.) तोही न मिळाला तर आहार दैवानेच मिळतो अशा निश्चयाने धीर धरून काकुळतीला न येतां उपाशीपोटी निजावे. *'जैसे न प्रार्थितां दुःख। प्राणी पावताती देख। तैसे न इच्छितां इन्द्रियसुख। भोगवी आवश्यक अदृष्ट।।'* ए.भा. ८:२१. बाह्यतः झोपूनही आपल्या हिताचा विचार जागा ठेवावा. ('स्वप्नजागृती मुकला। सुषुप्ती सांडोनि निजेला। शून्याचा पासोडा झाडिला। निजीं पहुडला निजत्वें।।' ए.भा. ८:४०.) आवश्यक ते बळ असूनही इंद्रियांच्या चिथावणीला दाद न देतां निष्क्रिय अजगराप्रमाणे पडून राहावे. मग हळूहळू इंद्रियांचे पाहणे, ऐकणे इत्यादि व्यापार थांबून जातात. (*'ओजः सहोबलयुतं बिभ्रद्देहमकर्मकम्। शयानो वीतनिद्रश्च नेहतेन्द्रियवानपि।।'* भा.पु. ११:८:४.)

**पूर्णो हीनोऽप्यजपरो न सर्पति न शुष्यति । ज्ञोऽब्धिवत्सिन्धुभिर्निम्नोऽनन्तपारो दुरत्ययः ।।१८।।**
**सदाऽक्षोभ्यो दुर्विगाह्यः प्रसन्नः स्तिमिताब्धिवत् ।**

ज्ञः अब्धिवत् सिन्धुभिः पूर्णः न सर्पति, हीनः न शुष्यति। स्तिमित+अब्धिवत् निम्नः अनन्तपारः दुः+अत्ययः अक्षोभ्यः (भवेत्)।१८।

**१०. समुद्र -** अशी उदासीनवृत्ती धारण केल्यावरही दैववशात् मिळणाऱ्या भोगांचा हर्ष किंवा न मिळाल्याचा खेद न मानता समचित्त राहण्याची समुद्राची शिकवण पुढच्या दीड श्लोकांत सांगतात. समुद्र जसा पावसाळ्यांत भरभरून वाहणाऱ्या नद्या येऊन मिळाल्या तरी फुगत नाही, आपली मर्यादा सोडत नाही किंवा ग्रीष्माने नद्यांचे प्रवाह आटले तरी कोरडा पडत नाही, तसाच ज्ञानी इष्टांच्या संयोगाने उचंबळत नाही (***न सर्पति***) किंवा त्यांच्या वियोगाने शोकाने सुकत नाही (***न शुष्यति***). सागरासारखाच तो गहन, गंभीर (***निम्नः***) असतो. समुद्राचा जसा पार लागत नाही तसाच योग्याच्या चित्ताचाही थांग लागत नाही. समुद्र जसा चौफेर विस्तीर्ण असतो तसाच योगी देशकालाच्या मर्यादांनी सीमित नसतो. सागराला ओलांडणे जसे दुरापास्त आहे (***दुरत्यय***) तसेच ज्ञानी पुरुषाची आज्ञा देवादिकांनाही अनुल्लंघनीय असते. समुद्र जसा आपली मारवेलीची मर्यादा ओलांडीत नाही तसाच ज्ञानी रागादि विकारांपासून मुक्त असल्याने अविकारी (***अक्षोभ्यः***) असतो. समुद्रात प्रवेश करणे कुणालाही सहज शक्य नसते तसेच योग्याशी कुणालाही सहज सलगी करता येत नाही. तरीही शांत सागरासारखाच तो बाह्यतः प्रसन्न असतो. (*'मुनिः प्रसन्नगम्भीरो दुर्विगाह्यो दुरत्ययः। अनन्तपारो ह्यक्षोभ्यः स्तिमितोद इवार्णकः।। समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः। नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः।।'* भा.पु. ११८५-६.)

**११. पतंग -** 'कुरङ्गमातङ्गपतङ्गभृङ्गमीना हताः पञ्चभिरेव पञ्च। एकः प्रमादी कथं न हन्यते यः सेवते पञ्चभिरेव पञ्च।।' (हरीण, हत्ती, पतंग, भुंगा आणि मासा हे अनुक्रमे नाद, स्पर्श, रूप, गंध आणि स्वाद ह्या एकेका

**नाऽवशोऽग्नौ विवन्नश्येत् स्त्रीलीलारूपमोहतः ॥१९॥**
**गृण्हीयात्सर्वतः सारं रमेन्नैकत्र चाल्पभुक् । संग्रहे नाशबीजेऽपि मधुकृद्वन्मुनिः सदा ॥२०॥**

स्त्री+लीला+रूप+मोहितः ना अग्नौ विवत् नश्येत्।१९। अपि मधुकृत्+वत् अल्प+भुक् मुनिः सदा सर्वतः सारं गृह्णीयात् न एकत्र। नाश+बीजे संग्रहे अपि (न) रमेत्।२०।

विषयाच्या आसक्तीने नाश पावतात तर या पांचही विषयांचा स्वैर उपभोग घेणारा कसा वांचेल?) या गरुडपुराणातील (प्रेतकल्पखंड-धर्मकांड ११:१८) वचनाकडे दुर्लक्ष करून विषयांतच रमणारा नाश पावतो हे ह्या पांचाकडून घतलेले शिक्षण पुढच्या साडेचार श्लोकांत सांगत आहेत. दिव्याच्या ज्योतीच्या रूपाला भुललेला पतंग जसा आपण होऊन दिव्यावर झेप घालून मृत्युमुखी पडतो तसाच स्त्रियांच्या रूपाला, तिच्या हावभाव-कटाक्षांना भुललेला असंयमी पुरुष नरकात पडतो.

**१२. मधुकृत् (मधुकर)** - या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे फुलामध्ये शिरून त्यांतला मध ग्रहण करतो तो भुंगा आणि दुसरी आपल्या आहारासाठी मध करणारी मधमाशी! भुंगा जसा लहान मोठा सर्व फुलांचा रस घेत एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जात असतो तद्वतच साधूने अनेक शास्त्रे आणि अनेक गुरूंपासून सार घेत जावे. (***'बहुशास्त्रगुरूपासनेऽपि सारादानं षट्पदवत्', सांख्यदर्शन ४:४***). स्वादाच्या आसक्तीने भुंगा एकाच फुलात राहिला तर संध्याकाळी ते फूल मिटले तर त्यांत अडकून पडतो. तसाच साधक एकाच घरी आसक्त होऊन राहिला तर त्यांच्या मोहात सांपडण्याची शक्यता आहे. म्हणून परिमित आहार ठेवून साधकाने एका ठिकाणी रमू नये. मधमाशी कष्टाने संग्रह करून मधाचे पोळे करते ते तिच्याच नाशाला कारणीभूत होते ह्यावरून हा धडा घ्यावा की संग्रहांत आपल्याही नाशाचे बीज आहे म्हणून संग्रह करू नये. (*'अणुभ्यच महद्भ्यच शास्त्रेभ्यः कुशलो नरः। सर्वतः सारमादद्यात्पुष्पेभ्य इव षट्पदः॥'* भा.पु. ११:८:१०. 'सायंतनं श्वस्तनं वा न सङ्गृहीत भिक्षुकः। मक्षिका इव सङ्गृह्णन्, सह तेन विनश्यति॥' भा.पु. ११:८:१२.)

**बध्येत नाऽङ्गनास्पर्शाच्-छूरैर्हन्येत वेभवत् । अन्योऽकात्सञ्चितं लुब्धैर्न भुक्तं नार्पितं धनम् ।।२१।।**
**भुङ्क्तेऽकार्जितगृह्यन्नं प्राग्भिक्षुर्मधुहेव च ।**

अङ्गना+स्पर्शात् बध्येत, वा इभ+वत् शूरैः हन्येत। लुब्धैः अकात्+सञ्चितं न भुक्तं न अर्पितं धनं मधुहा इव अन्यः भुङ्क्ते। अक+अर्जित+गृहीत+अन्नं प्राक् भिक्षुः (भुङ्क्ते)।२१।

**१३. हत्ती -** मादीच्या वासाने मस्त हत्ती आपल्यासाठी खणलेल्या गर्तेत सांपडतो आणि जन्माचा दास होऊन जातो. किंवा दुसऱ्या बलिष्ठ हत्तीकडून मारला जातो. म्हणून शहाण्या माणसाने स्त्रीस्पर्शापासून दूर रहावे. (*'पदाऽपि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि। स्पृशन्करीव बध्येत करिण्या अङ्गसङ्गतः।।'* भा.पु. ११:८:१३.)

**१४. मधुहा -** त्याग किंवा भोग न करतां केलेला द्रव्यसंग्रह आपला घातच करतो आणि आपण प्रयत्न न करतांही आपल्याला अन्नादि भोग प्राप्त होऊ शकतात हे मधमाशी आणि मध गोळा करणारा मधुहर यांच्यापासून घेतलेले शहाणपण सांगतात. एकाने कष्टाने संपादन केलेले धन त्याने स्वतः भोगले नाही किंवा इतरांनाही दान केले नाही तर मधमाशीच्या पोळ्यांतल्या मधाप्रमाणे दुसराच लुबाडतो. तसेच गृहस्थाने उद्योग करून मिळवलेले अन्न त्याच्या आधीच संन्यासी खाऊन जातो. (*'न देयं नोपभोग्यं च लुब्धैर्यद्दुःखसञ्चितम्। भुङ्क्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधुः।।'* भा.पु. ११:८:१४.)

**१५. हरीण -** अर्ध्या श्लोकांत हरिणाची शिकवण सांगितली आहे. ग्राम्य गीताच्या श्रवणाने (भक्तिसंगीताच्या नव्हे) पुरुष घंटानादाने भुललेल्या हरिणासारखा बंधनांत अडकतो. नृत्यादिक पाहिल्यानेसुद्धा हरिणीच्या पोटी जन्मलेल्या ऋष्यशृङ्गमुनीप्रमाणे माणूस वेडा होतो. (*'ग्राम्यगीतं न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित्। शिक्षेद्धरिणाद्बद्धान्मृगयोर्गीतमोहितात्।। नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम्। आसां क्रीडनको वश्य, ऋष्यशृङ्गो मृगीसुतः।।'* भा.पु. ११:८:१७-१८.)

**ना बध्येतैणवद्गीतान्-नृत्याद्वाप्यृष्यश्रृङ्गवत्   ।।२२।।**
**प्रमाथिजिह्वया नैति बडिशैर्मत्स्यवल्लयम् । जय्याल्पभुज्या साऽसक्त्या जितं सर्वं जिते रसे ।।२३।।**

गीतात् नृत्यात् वा ना ऐणवत् वा ऋष्यशृङ्गवत् बध्येत।२२। ना प्रमाथि+जिह्वया बडिशैः मत्स्यवत् लयं एति। सा अल्प+भुज्या असक्त्या जय्या। रसे जिते सर्वं जितम्।२३।

**१६. मासा -** मत्स्यापासून मिळालेले ज्ञान सांगतात. मनाला अशांत करणारी जीभ माणसाचा, आमिषाच्या ओढीने गळींत अडकणाऱ्या माशासारखा घात करते. त्यासाठी मिताहाराने आणि अनासक्तीने जिभेवर ताबा मिळवावा. स्वादाची आवडनिवड टाकून अन्न औषधाप्रमाणे खावे. आधीचा (दुसऱ्या क्रमांकाचा) गुरू जो देहांतर्गत वायू (प्राण) त्याच्याकडून घेतलेलाच हा धडा वेगळ्या तऱ्हेने सांगितला आहे. सर्व इंद्रियांत जिह्वा ही जिंकण्याला कठीण असल्याने तिचा विषय जो रस तो जिंकला की सर्व (विषय) जिंकले असे म्हटले आहे. (*‘इन्द्रियाणि जयन्त्याशु निराहारा मनीषिणः। वर्जयित्वा तु रसनं तन्निरन्नस्य वर्धते।।’* भा.पु. ११:८:२०. *‘विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः। रसवर्ज्यं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।’* भ.गीता २:५९.)

**१७. वेश्या -** अगदी जिह्वाही जिंकणाऱ्या साधकाच्या परमार्थाला आशा अडवते. त्यासाठी वश्येयेकडून घेतलेले नैराश्याचे शिक्षण पुढच्या अडीच श्लोकांत दिले आहे. विदेहपुरीत राहणारी एक पिंगला नांवाची वेश्या होती. एका रात्री भरपूर पैसे देणाऱ्या गिऱ्हाइकाच्या आशेने (रस्त्यावरील येणाऱ्या-जाणाऱ्या पुरुषांना खुणावीत) दारांत उभी राहिली. रात्रभर वाट पाहूनही अपेक्षित असलेला पुरुष तिला मिळाला नाही. द्रव्याची तीव्र लालसा न पुरल्याने तिला जे वैफल्य आले त्यांतूनच दैवयोगाने तिला परिणामी सुख देणारा उबग (**निर्वेद**) आला आणि तिचा विवेक जागा झाला. स्वतःचा धिक्कार करीत ती म्हणू लागली, ‘आपल्याच अंतरात राहणाऱ्या, आत्मानुभवाने निरतिशय आनंद आणि परम पुरुषार्थ देणाऱ्या, हृदयांतील (अहंकाराची) गांठ तोडून संशयाचे जाळे छेदून स्वस्वरूपात रमविणाऱ्या, रामाला सोडून मी ह्या

**वेश्यैकार्थदकान्ताशा-ध्वस्तनिद्रा सुखावहं । चिन्ताहेतुं हि निर्वेदं गत्वाऽत्मस्थं रतार्थदम् ।।२४।।**
**रामं हित्वा कुवृत्त्यान्यं भीशुङ्मोहदमध्रुवम् । काङ्क्षे धिङ्मात्मनात्मानं रमे क्रीत्वाऽमुनेति सा ।।२५।।**
**मत्वा तथाऽभूत्ध्याशाऽकं नैराश्यं परमं सुखम् ।**

एका वेश्या अर्थद+कान्त+आशा+ध्वस्त+निद्रा चिन्ता+हेतुं हि सुखावहं निर्वेदं गत्वा आत्मस्थं रत+अर्थदं।२४। रामं हित्वा कुवृत्त्या अन्यं भी+शुक्+मोहदं अध्रुवं काङ्क्षे। मां धिक्। आत्मना आत्मानं क्रीत्वा अमुना (अहं) रमे' इति सा।२५। मत्वा तथा अभूत्। आशा अकं, नैराश्यं परमं सुखम्।

हीन (वेश्या)वृत्तीने, ज्याच्या मनाविरुद्ध वागल्यास भय, विरहाने शोक आणि अतिस्नेहाने मोह वांट्याला येतात अशा नाशिवंत कामलंपट पुरुषाची इच्छा केली! माझा धिक्कार असो!! यापुढे मात्र मी हा देह स्वयंप्रकाश आत्मारामाला विकून (समर्पण करून) अपरोक्षतया (त्याच्याशी एकरूप होऊन) रममाण होईन.' असा विचार करून आणि आशेचा खोडा मोडून ती आत्मानंदांत निमग्न झाली. यावरून हे सप्ष्ट होते की आशाच सर्व दुःखाचे कारण आहे. नैराश्यांतच निरतिशय सुख आहे. *'निराशः सुखी पिङ्गलावत्'* असे सांख्यदर्शनात (अ.१४ सूत्र ९) म्हटले आहे. (*'आशा हि परमं दुःखं नैराश्यः परमं सुखम्। यथा संछिद्य कान्ताशा सुखं सुष्वाप पिङ्गला।।'* भा.पु. ११:८:४३.)

**१८. टिटवा -** आशारहित साधकानेही जर परिग्रह केला तर दुःखालाच कारण होतो ही टिटव्याची शिकवण एका श्लोकांत दिली आहे. आपल्या आवडत्या वस्तूंचा परिग्रह (संग्रह) दुःखपर्यवसायी आहे हे जाणणाऱ्याला अकिंचनालाही अपरिमित सुख मिळते. अकिंचन म्हणजे केवळ दरिद्री नव्हे तर ज्याने सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे असा. टिटवा मांसाचा घास (न खातां) तोंडांत धरून उडाला तर बाकीचे टिटवे त्याच्यावर हल्ला करून त्याला हैराण करून सोडतात. त्याने तो घास टाकून दिला तर मात्र सगळे टिटवे त्या घासाकडे झेपावतात आणि आमिष टाकून दिलेला (**व्यामिष**) टिटवा परिग्रहापासून मुक्त असल्याने दुरून सुखाने (सुखी) त्यांची मजा पाहात बसतो. (*'सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः। तदामिषं परित्यज्य स सुखं समविन्दत।।'* भा.पु. ११:९:२.)

**परिग्रहोऽकाय तज्ज्ञोऽस्वोऽप्यनन्तसुखायते ।।२६।।**
**सामिषं कुररं हन्ति शूरोऽतो व्यामिषः सुखी । मानावमानचिन्तोनः स्वक्रीडः स्वरतिः सुखी ।।२७।।**
**बालवद्धि जडोऽज्ञोऽर्भश्-चात्मानन्दो गुणातिगः । भङ्क्त्वैकैकं महारावान् रणन्तौ द्वौ कुमार्यपि ।।२८।।**
**पाण्योर्धृत्वैकैकशङ्खं रहःकृत्येऽलभत्सुखम् । कलिर्भूम्नि द्वयोर्वार्ता ह्येकतस्तच्छङ्खवच्चरेत् ।।२९।।**

परिग्रहः अकाय। तज्ज्ञः अस्वः अपि अनन्त+सुखायते। सामिषं कुररं शूरः हन्ति, व्यामिषः सुखी। मान+अवमान+चिन्ता+ऊनः स्व+क्रीडः स्व+रतिः जडः अज्ञः बालवत् सुखी। अर्भः गुण+अतिगः च आत्म+आनन्दौ। द्वौ रणन्तौ एक+एकं महा+रावान् (शङ्खान्) भङ्क्त्वा पाण्योः एक+एक शङ्खं धृत्वा कुमारी अपि रहः+कृत्ये सुखं अलभत्। भूम्नि कलिः द्वयोः वार्ता हि शङ्खवत् एकतः चरेत्।२८-२९।

**१९. बालक -** अशा परिग्रहशून्यालाही मानापमान आणि चिंता सोडतां आले तर तो परमसुखी होईल. ही बालकापासून घेतलेली शिकवण एका श्लोकात सांगतात. त्रिगुणात्मक प्रकृतीला ओलांडून परमात्मस्वरूप झालेला योगी, मान, अपमान आणि चिंता यांनी रहित असलेल्या स्वतःशीच खेळणाऱ्या आणि आपल्यातच हरवून गेलेल्या निष्क्रीय, अजाण बालकाप्रमाणे आत्मानंदात निमग्न असतो. आत्मसाक्षात्कारी पुरुष आणि बालक हे दोघेही चिन्तामुक्त असल्याने आपल्याच आनंदांत परमानंदात न्हात असतात. (*'द्वावैव चिन्तया मुक्तौ परमानन्द आप्लुतौ। यो विमुग्धो जडो बालो, यो गुणेभ्य परं गतः।।'* भा.पु. ११:९:४.)

**२०. कुमारी -** ह्या गुणातीत अवस्थेच्या प्राप्तीसाठी अभ्यासाची आवश्यकता आहे. हा अभ्यास अनेकांनी करून होत नाही आणि दोघांतही होत नाही हे कुमारीच्या कांकणाकडून घेतलेले कपिलमुनिप्रणीत सांख्यदर्शनातील (४:१०) शिक्षण सांगितले आहे. कुणी एक कुमारी घरांतील सर्व कुटुंबीय बाहेर गेलेले असतां आलेल्या सोयऱ्यांच्या पाहुणचारासाठी एकांतात साळी कांडायला बसली. त्या वेळी तिच्या हातातील शंखांच्या कांकणांचा मोठा आवाज होऊ लागला.

**एकचार्यप्रमत्तोऽल्प-वाग्गुहास्थोऽगृहो मुनिः । एकोऽहिवद्गत्यलक्ष्यो गृहारम्भोऽध्रुवात्मनः ।।३०।।**
**विफलोऽकाय सर्पोऽन्य-कृतधाम्न्येधते सुखम् ।**

अहिवत् मुनिः एक+चारी अप्रमत्तः अल्प+वाक् अगृहः गति+अलक्ष्यः। अध्रुव+आत्मनः गृह+आरम्भः।३०। विफलः अकाय। सर्पः अन्य+कृत् धाम्नि सुखं एधते।

त्या आवाजाने आपली गरीबी पाहुण्याना कळेल ह्या लाजेने तिने सगळी कांकणे काढली आणि प्रत्येक हातात फक्त दोन-दोन ठेवली. पण त्याचाही आवाज होतो असे पाहून तिने आणखी कांकणे काढून हातात सौभाग्यचिह्न म्हणून एकेकच कांकण ठेवले (***'पाण्योः एकैक शंखं धृत्वा'***). अशा रीतीने तिचे साळी कांडण्याचे काम गुप्तपणे करून (***'रहःकृत्ये'***) ती सुखी झाली (***'सुखं अलभत्।'***). या कलियुगात भूलोकी अनेकजण किंवा दोघेसुद्धा एकत्र आले की खाण्यापिण्याच्या (विषयाच्या, प्रपंचाच्या) गोष्टी होणारच. त्यामुळे शंखा(च्या कांकणां)प्रमाणे एकट्यानेच तप करावे. (*'वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि। एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कङ्कणः।।'* भा.पु. ११:९:१०.)

**२१. सर्प -** वरीलप्रमाणे निःसंग झाल्यावरही परमार्थांत विघ्न होऊं नये यासाठी ठराविक घर करू नये हे सर्पाकडून घेतलेले शिक्षण दीड श्लोकात सांगितले आहे. मुनीने सापासारखे एकट्याने संचार करीत (***'एकचारी'***), सावधानपणे (***'अप्रमत्त'***), बोलणे मोजके ठेवून (***'अल्पवाक्'***), बाहेरील वर्तनावरून आपली आंतरिक स्थिती प्रकट न होऊ देता (***'गतिअलक्ष्यो'***), वास्तव्यासाठी घर न बांधता (***'अगृहो'***) गुहेत किंवा घळीत राहावे (***'गुहास्थः'***). नाशिवंत देहासाठी (***'अध्रुवस्य आत्मनः'***) घर बांधण्याचा खटाटोप (***'गृहारम्भः'***) व्यर्थ (***'विफलः'***) आणि कष्टदायक (***'अकाय'***) आहे हे जाणून, *'अनारम्भेऽपि परगृहे सुखी सर्पवत्'* कपिलमुनींच्या वचनाला (सांख्यदर्शन ४:१०) अनुसरून साप जसा दुसऱ्याने बांधलेल्या घरांत सुखाने राहतो तसे राहावे. (*'एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः। अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः।। गृहारम्भोऽतिदुःखाय विफलश्चाध्रुवात्मनः। सर्पः परकृतं वेश्म प्रविश्य सुखमेधते।।'* भा.पु.११:९:१४-१५.)

**जितश्वासासनेनेशे वैराग्याभ्यासबद्धहृत् ।।३१।।**
**संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्ववृद्ध्यैत्यनिन्धनम् । निर्वाणं वेत्त्यतो नान्तर्-बहिःस्थं मुनिरात्मदृक् ।।३२।।**
**यथेष्वितात्मेषुकृन्नो वेदेनं यान्तमग्रतः ।**

जित+श्वास+आसनेन वैराग्य+अभ्यास+बद्ध+हृत् ईशे।३१। संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्व+वृद्ध्या अनिन्धनं निर्वाणं एति। अतः आत्म+दृक् मुनिः अन्तः बहिस्थं न वेत्ति।३२। यथा इषु+आत्मा इषु+कृत् अग्रतः यान्तं इनं न वेद।

**२२. शरकार -** एकांतात वास करणाराही जर आसन आणि श्वास यांना जिंकेल तरच त्याला अविचल एकाग्रतेचा लाभ होईल हे शरकाराकडून घेतलेले शिक्षण आतां दोन श्लोकात सांगतात. वैराग्यपूर्वक अभ्यास करून आसनजय आणि प्राणजय साधणाऱ्या योग्याने द्वैताचे भानही जिच्यात राहत नाही अशा समाधीच्या सिद्धीसाठी दोषदृष्टीचा त्याग आणि विषयांचा भोग न मिळाला तरी तळमळ न होणे यांच्या सरावाने दृढ झालेल्या ऐहिक आणि पारलौकिक विषयांसंबंधीच्या वैराग्याने विक्षेपांचा निरास करून, चित्ताला स्थिर करण्याच्या अभ्यासाने चित्तावर ताबा मिळवून ते बाणाप्रमाणे प्रणवरूपी धनुष्यावर चढवून त्याचे प्रत्यक्ब्रह्माशी एकरूप अशा परब्रह्माच्या लक्ष्यावर उत्तम प्रकारे संधान करावे. भावार्थ असा. *'यत्रैकाग्रता तत्राविशेषात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (४:४:११) (चित्ताची) एकाग्रता हे ध्यानाचे प्रमुख साधन होय. ती एकाग्रता *'आसीनः संभवात्'* या सूत्रानुसार (४:१:७) आसनानेच साधत असल्याने प्रथम आसनजय केला पाहिजे. आसन पक्के झाले की मग श्वासावर नियंत्रण करतां येते. श्वास(प्राण)जय झाला की श्वासाच्या अधीन असलेले मनही निश्चल होते. त्याला वैराग्याने विक्षेपरहित करून आणि अभ्यासाने बांधून म्हणजेच वश करून (**अभ्यासेन बद्धं**) ध्येयावर (परमेश्वरावर) स्थिर करावे (**ईशे संयुक्तं**). त्या मनाचा झोपेत जसा लय होतो तसा मुळीच होत नाही. लय आणि विक्षेप हे मनाचे गुणधर्म असले तरी परमानंदस्वरूप ईश्वराशी संलग्न झाल्याने लय-विक्षेपांना कारणीभूत तमोगुण आणि रजोगुण यांचे दमन होते आणि सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो.

**प्रेम्णाप्यचलहृद्ध्यानाद्-विष्णोः सारूप्यमेति ना ।।३३।।**
**प्राग्रूपमुत्सृजन्पेशस्कृद्ध्यानात्कीटवद्द्रुतम् ।**

विष्णोः प्रेम्णा अचल+हृत्+ध्यानात् ना प्राक्+रूपं उत्सृजन् पेशस्कृत्+ध्यानात् कीटवत् द्रुतं सारूप्यं एति।३३।

शेवटी सत्त्वगुणाचाही उपशम होऊन ते मन तिन्ही गुण आणि त्यांची कार्ये यांच्यापासून मुक्त होते (**कर्मवासनां मुक्त्वा**). असे वृत्तिशून्य (**निर्वाणं**) मन ध्येयाकार (ब्रह्माकार) होऊन आपल्या स्वरूपात स्थिर होते. आा रीतीने पतंजलींच्या *'योगश्चित्तवृत्तिनिरोधः'* (यो.सू. १:४) 'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्' या सूत्रांनसार योग सिद्ध होतो. वृत्तिशून्य मनाच्या ध्येयाकार अवस्थेलाच योगाच्या भाष्यकारांनी असंप्रज्ञात समाधी असे नाव दिले आहे. (*'मनसो वृत्तिशून्यस्य ब्रह्माकारतया स्थितिः। याऽसम्प्रज्ञातनामाऽसौ समाधिरभिधीयते।।'*) द्वैताचे भानच नसल्याने आंत-बाहेर त्या योग्याला कांहीच दिसत नाही कारण तो स्वरूपाच्या दर्शनात निमग्न असतो (*'आत्मदृक्'*). आतां दृष्टान्त सांगितला आहे. *'इषुकारवन्नैकचित्तस्य समाधिहानिः'* या सांख्यसूत्रानुसार (४:१४) बाणाला धार लावण्यात गढून गेलेल्या शरकाराला ('इषुकार') समोर रस्त्यावरून वाजतगाजत गेलेला राजाही (**इन**) कळला नाही. अशा उपासकाला (प्रारब्धाच्या प्रतिबंधाने) आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वीच मृत्यू आला तर त्याच्या अभ्यासाच्या प्रभावाने आणि ईश्वराच्या अनुग्रहाने मृत्यूच्या वेळी सुषुम्ना नाडीचा मार्ग मिळून तो मुक्त होतो अशा अर्थाचे ब्रह्मसूत्र आहे (४:२:१७). *('मन एकत्र संयुज्याज्जितश्वासो जितासनः। वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतन्द्रितः।। यस्मिन्मनो लब्धपदं यदैतच्छनैः शनैर्मुञ्चति कमरेणून्। सत्त्वेन वृद्धेन रजस्तमच विधूय निर्वाणमुपैत्यनिन्धनम्।। तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किञ्चिद्बहिरन्तरो वा। यथेषुकारो नृपतिं व्रजन्तमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे।।'* भा.पु. ११:९:११-१३.)

**यथोर्णनाभिस्ततोर्णां विहार्यान्तेऽत्ति तां तथा ।।३४।।**

**प्राक्स्वमायासृष्टमेकः संहृत्याभूत् क्षयेऽद्वयः । शक्त्याखिलाश्रयः सर्वेट् कालेनात्मानुभावतः ।।३५।।**

यथा ऊर्णनाभिः ऊर्णां तत विहार्य तां अत्ति तथा..।३४। एकः प्राक् स्व+माया+सृष्टं (जगत्) संहृत्य क्षये अद्वयः अभूत्। शक्त्या अखिल+आश्रयः सर्वेट् आत्म+अनुभावतः..।३५।

**२३. कुंभारीण माशी (पेशस्कार) -** वरीलप्रमाणे ध्याननिष्ठ असलेल्या साधकाला जीवात्म्याशी एकरूपच अशा परमात्म्याचे स्वरूप प्राप्त होणे हे नवल नाही, हे कीटकापासून मिळवलेले ज्ञान आतां सांगत आहेत. प्रेमाने, द्वेषाने किंवा भयानेसुद्धा (**प्रेम्णा अपि**) व्यापक परमात्म्याचे (**विष्णो**ः) स्थिर चित्ताने ध्यान केले म्हणजेच, विजातीय प्रत्ययांचा निरास करीत आणि सजातीय प्रत्ययांना प्रवाहित करून निदिध्यासन केल्याने, मिथ्या उपाधींशी तादात्म्य पावून अध्यासाने स्वीकारलेले कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादींनी युक्त असे मायिक रूप (जीवत्व) टाकून देऊन पुरुष (**ना**) शीघ्रच परमात्म्याशी एकरूप होतो. ('प्रारब्धजनित') प्रतिबंध नसले तर याच जन्मात अन्यथा जन्मातराने तो मुक्त होतो. हेच व्यासमुनींनी *'ऐहिकमप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्'* सांगितले आहे. प्रतिबंधांच्या अभावी ज्या जन्मी उपदेश व अभ्यास त्याच जन्मी ज्ञान होऊन मोक्ष होतो हे ठीक आहे. पण तसा तो झाला नाही तर जन्मांतरी होतो याला प्रमाण म्हणून ऐतरेय उपनिषदातील (२:५) वामदेवाने गर्भात पहुडलेल्या अवस्थेतच आपले ज्ञान प्रकट केल्याचे उदाहरण दिले आहे. कुंभारीण माशीने आपल्या घरट्यात आणून ठेवलेला किडा जसा तिच्याकडून वरचेवर दंश झाल्याने तिच्या भयाने तिचे निरंतर ध्यान करून तिच्यासारखाच (कुंभारीण माशीच) होतो. जीव तर स्वरूपतः ब्रह्मच असल्याने (*'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'*, बृ.उ. ४:४:५१) त्याचे ब्रह्मरूप पावणे हे नवल नाही. ('यत्र यत्र मनो देही धारयेत् सकलं धिया। स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वाऽपि याति तत्तत्स्वरूपताम्।। कीटः पेशस्कृतं ध्यायन् कुडां तेन प्रवेशितः। याति तत्साम्यतां राजन् पूर्वरूपमसन्त्यजन्।।' भा.पु. ११:९:२२-२३.)

**साम्येतसत्त्वादिशक्तिः प्रधानपुरुषेडजः । व्युपाधिः परमानन्दो मोक्षाख्यः सपरावरः ।।३६।।**
**गुणत्मिकां स्वमायां स क्षोभयन्स्वानुभावतः । तया सृजति सूत्रं सा त्रिगुणा शक्तिरासृजत् ।।३७।।**
**विश्वं यस्मिन्प्रोतमेतद् येन संसरते पुमान् ।**

साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः वि+उपाधिः प्रधान+पुरुष+ईट् अजः मोक्ष+आख्यः स+पर+अवरः परम+आनन्दः (आस्ते)।३६। सः स्व+अनुभावतः गुण+आत्मिकां स्व+मायां क्षोभयन् तया सूत्रं सृजति। सा त्रिगुणा शक्तिः विश्वं असृजत्।३७। यस्मिन् पुमान् संसरते येन तत् विश्वं प्रोतम्।

**२४. कांतीण -** ईश्वराच्या एकमेवाद्वितीयत्वाचे कांतिणीकडून घेतलेले ज्ञान आतां सांगितले आहे. कुठल्याही बाह्य सामग्रीविना कोळीण (**ऊर्णनाभी**) जशी आपल्याच नाभीपासून निघालेल्या तंतूला मुखाद्वारे काढून तो पसरून त्या जाळ्यात क्रीडा करते आणि ती क्रीडा झाल्यावर ते जाळे खाऊन टाकते. त्याचप्रमाणे सृष्टीच्या पूर्वी (**'प्राक्'**) स्वयंभू एकमेवाद्वितीय (**'एकः'**) परमेश्वराने आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) उपादानकारण जी माया तिच्या द्वारां जगाची उत्पत्ती केली. जगताच्या लयाच्या वेळी (**क्षये**) आपल्याच काळशक्तीने त्याचा आपल्यांतच उपसंहार करून पुनश्च तो एकमेवाद्वितीय झाला. कालांतराने आपल्या आत्मशक्तीने (**आत्मानुभावतः**) सत्त्वादि त्रिगुणांची साम्यदशा झाल्यावर (**साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः**), प्रकृती आणि पुरुष यांचा स्वामी आणि म्हणूनच अजन्मा (**प्रधान+पुरुष+ईट् अजः**) असलेला निरुपाधिक (**व्युपाधिः**) परमानंदस्वरूप (**परमानंदः**) मोक्ष (**मोक्षाख्यः**) तोच आहे. हा कोण आहे? ब्रह्मा? नव्हे तर ब्रह्मादि श्रेष्ठ आणि इतर सर्व जीवात्मे यांचा स्वतांत उपसंहार करणाराच (**सपरावरः**) मोक्षरूपी परमात्मा आहे. तोच परमात्मा आपल्या आत्मशक्तीने (**स्वानुभावतः**) आपल्या त्रिगुणात्मक मायेला क्षोभवून तिच्या द्वारा जीवाच्या संसरणाचे कारण जे क्रियाशक्तिप्रधान महत्तत्त्व (**सूत्र**) निर्माण केले. त्याच त्रिगुणात्मक शक्तीने त्या सूत्रापासून अहंकाराद्वारा सर्व विश्वाची निर्मिती केली. त्याच कारणभूत समष्टीरूप सूत्राने हे जग गुंफले आहे.

**देहात्स्तो बोधवैराग्ये पारक्यात्सोद्भवक्षयात् ।।३८।।**
**आत्मेष्टभृत्सृष्टबीजः प्रियेच्छुर्नश्यति द्रुवत् । गावः स्वार्थे सपत्नीवत्तं लुनन्ति हि दुर्लभम् ।।३९।।**
**मत्वा नृजन्मात्तवित्क्ष्मां चरे मुक्तोऽनहंकृतिः ।**

पारक्यात् स+उद्भव+क्षयात् बोधवैराग्ये स्तः।३८। प्रिय+इच्छुः आत्म+इष्ट+भृत् सृष्ट+बीजः द्रुवत् नश्यति। इन्द्रियाणि तं सपत्नीवत् लुनन्ति।३९। नृजन्म दुर्लभं हि मत्वा आत्त+वित् क्ष्मां अन्+अहंकृतिः चरे।

याज्ञवल्क्याने गौतमाला सांगितल्याप्रमाणे हा लोक, परलोक, सर्व जीवमात्र ज्या सूत्रांत बांधलेले आहेत ते सूत्र म्हणजे वायूच होय (बृ.उ. ३:७:२). याच प्राणात्मक सूत्राने जीव या संसारांत फिरत असतो. (*'केवलात्मानुभावेन स्वमायां त्रिगुणात्मिकाम्। संक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिन्दम।। तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजन्तीं विश्वतोमुखम्। यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान्।। यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां संतत्य वक्त्रतः। तथा विहृत्य भूयस्तां ग्रसत्येवं महेश्वरः।।'* भा.पु. ११:९:२२-२३.)

**देह**सुद्धां गुरूच आहे हे सांगतात. देह कोल्ह्याकुत्र्यांसारख्या परक्यांचे भक्ष्य (**पारक्यात्**) होत असल्याने त्याच्यापासून विवेकाचे (**बोध**) शिक्षण मिळते. मातेचे रक्त ('रज') आणि पित्याचे रेत या दोन मलांपासून देहाची उत्पत्ती (**उद्‌भव**) होते आणि मृत्यू (**क्षय**) तर जन्माच्या आधीपासूनच त्याच्या मागे लागलेला आहे. असा घृणास्पद देह सतत धारण करणे ह्यापेक्षा वैराग्याला अधिक मोठे कारण काय असूं शकते? विष्णुपुराणात म्हटले आहे की आपल्या देहाच्या दुर्गंधीला जो माणूस विटत नाही त्याला वैराग्य व्हायला दुसरा काय उपदेश करावा? स्वतःचे आणि स्वकीयांचे पोषण करणारा (**आत्म+इष्ट+भृत्**) सदैव सुखाची अभिलाषा बाळगणारा (**प्रियेच्छुः**) हा देह, दुसऱ्या वृक्षाचे बीज निर्माण करून सुकणाऱ्या वृक्षाप्रमाणे जन्मांतराचे बीजरूप कर्म निर्माण करून नाश पावतो. इंद्रिये ह्या देहरूपी पतीला, सवतीसारख्या आपापल्या विषयांकडे खेचत असतात.

**तच्छुत्वा समचित्तोऽभून् मुक्तसङ्गो यदुर्द्रुतम् ।।४०।।**

तत् श्रुत्वा यदुः द्रुतं सम+चिच्चः मुक्त+सङ्गः अभूत्।४०।

असे असले तरी आत्मज्ञानाचा अधिकार या देहाला असल्याने तो दुर्लभ मानून वरील चोवीस गुरूंकडून घेतलेल्या ज्ञानाने सर्व संगांचा त्याग करून निरहंकार वृत्तीने या भूमीवर अवशिष्ट प्रारब्ध भोगीत मी ह्या पृथ्वीवर संचार करतो. (*'देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्त्वनिधनं सततार्त्युदर्कम्। तत्त्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसङ्गः।।* भा.पु. ११:९:२५.)

हा यदुराजाला सर्व संग आणि त्याचे मूळ अहंकार यांना सोडून निर्विकारपणे प्रारब्ध भोगीत संचार करण्याचा अप्रत्यक्ष आदेशच होता. सद्‌गुरुकृपेने ज्ञान झाल्यानंतर संचित कर्माचा नाश होतो. प्रारब्ध मात्र भोगूनच संपवावे लागते, ह्या छांदोग्योपनिषदातील (६:१४:२) आणि ब्रह्मसूत्रातील (४:१:१९) सिद्धांताला हे धरूनच आहे. हा त्या अवधूताचा आदेश श्रवण करून यदुराजा, अधिकारी उपदेशकाच्या प्रभावाने, ज्याचे चित्त सम म्हणजे सर्वसंगपरित्याग केल्याने शत्रू, मित्र, उदासीन, आप, पर हे सर्व ज्याला सारखेच आहेत, तसा झाला; किंवा ज्याचे चित्त सम म्हणजे विकारशून्य आहे असा झाला. याज्ञवल्क्यस्मृतीत (प्रायश्चित्ताध्याय, ५४) म्हटल्याप्रमाणे कांट्यांनी ओरबाडणाऱ्यावर किंवा चंदनाने माखणाऱ्यावर जो सारखाच शांत ('अक्रुद्ध') आणि प्रसन्न ('परितुष्ट') असतो असा यदु झाला. हा सद्गुकृपेचा प्रभाव होय.

अधिकारी सद्‌गुरूंकडून श्रवण केल्याने हे ज्ञान यदूला लगेच झाले. कठोपनिषदांत प्रतिपादल्याप्रमाणे (१:२:७-८) या ब्रह्मज्ञानाचा निपुण वक्ता ही नवलाईचीच गोष्ट आहे; तसेच ह्या ज्ञानाची प्राप्तीही कुणा विरळ्या भाग्यवंतालाचा होते. अनधिकारी वक्त्याकडून हे समजणे शक्य नाही. स्वरूपसाक्षात्कार झालेल्या गुरूविना ह्या अचिंत्य आणि सूक्ष्मतम

ज्ञानात गती होत नाही. (*'अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः। सर्वसङ्गविनिर्मुक्तः समचित्तो बभूव ह।।'* भा.पु. ११:९:३३.)

असे **हे परमार्थाचा उपदेश करणारे गुरू नाहीत तर आपल्या बुद्धीने केलेले असंभावनादि दोषांचे निराकरण करणारे गुरू आहेत** हे लक्षात घ्यायला हवे. बृहदारण्यक उपनिषदांत (३:९:२७) याज्ञवल्क्याने ह्याच औपनिषद पुरुषाविषयी शाकल्याला विचारले होते आणि त्याला उत्तर देतां न आल्याने त्याचे मस्तक गळून पडले होते. वरील ३८ श्लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी अवधूतगीता (दत्तपुराण ४५:८ च्या टीकेत) असे नांव देऊन ते श्लोक तिथे तसेच दिले आहेत.

## प्रह्लादास उपदेश

आतां चार श्लोकांत (दत्तप्रभूंनी) प्रह्लादावर केलेल्या अनुग्रहाचे संक्षेपाने वर्णन केले आहे. हाच विषय श्रीमहाराजांनी श्रीमद्दत्तपुराणाच्या १५ व १६ व्या अध्यायात विस्ताराने मांडला आहे. त्या अध्यायांतील संबंधित श्लोक एकत्र करून ते स्तोत्रसंग्रहात 'श्रीदत्तात्रेयहृदयम्' या नांवाने प्रसिद्ध झाले आहे. अवधूतगीतेप्रमाणेच याही आख्यानाचे मूळ श्रीमद्भागवत पुराणात आहे. विषयाची मांडणी, शब्दयोजना इत्यादीही भागवतातील मूळ आख्यानाला अनुसरूनच आहेत. कांही कांही श्लोक तर जवळ जवळ सारखेच आहेत. ह्या दोन्ही स्रोतांचा उपयोग करीतच आपण ह्या चार श्लोकांची टीका पाहणे उद्बोधक ठरेल.

भागवतपुराणात सप्तम स्कंधांत नारद-युधिष्ठिर संवादात हे आख्यान नारदांनी सांगितले आहे. बालपणापासून भागवत धर्मात रमलेला असूनही प्रह्लादाला आत्मज्ञानाच्या अभावाने परम शांतीची प्राप्ती झाली नाही. त्यामुळे उदासीन वृत्तीने शिकारीच्या निमित्ताने तो आपल्या लवाजम्यासह रानावनात संचार करीत असतां कावेरीच्या तीरी सह्याद्री पर्वतावर त्याला सद्भाग्याने, धुळीच्या लेपाने ज्याचे मलापहारक तेज झांकलेले आहे,

**कष्टसंसारादिहेतु-प्राणार्थेहापनुत्तये । वैराग्यतोषदमधुकृन् महाहिसुशिक्षितम् ।।४१।।**

कष्ट+संसार+आदि+हेतु+प्राण+अर्थ+इहा अपनुत्तये वैराग्य+तोष+दं मधुकृत्+महा+अहि+सुशिक्षितम्..।४१।

असा एक अवधूत भूमीवर पहुडलेला दिसला. भागवतात अवधूत शब्दाचा उपयोग न करता त्याचा आजगर मुनि असा निर्देश केला आहे. त्याच्या बोलण्याचालण्यावरून किंवा इतर बाह्य चिह्नांवरून लोकांना त्याच्या वर्णाचा वा आश्रमाचा कांहीच पत्ता लागत नव्हता. त्याच्या पायांवर मस्तक ठेवून प्रह्लादाने त्याला नमस्कार केला, त्याची विधिवत् पूजा केली आणि तो महाभागवत दैत्य त्याला नम्रपणे प्रश्न करू लागला. 'महाराज! आपण कांही उद्योग करतांना दिसत नाहीत आणि निर्धन आहांत तरी एखाद्या भोगवान पुरुषाप्रमाणे आपला देह पुष्ट दिसतो. खरे तर उद्योगाने धन संपादन केल्यावर आहार-विहारादि इष्ट भोग प्राप्त झाल्यानेच माणसाचा देह असा पुष्ट होतो. आपण तर ज्ञानी, निपुण, वाक्पटु आणि कार्यक्षम असूनही इथे कांहीच न करता झोपलेले दिसता! तरीही आपले शरीर पुष्ट कसे आहे? आपल्याला प्राण किंवा धन यांची कांहीच चिंता दिसत नाही. या निर्मनुष्य ठिकाणी आपल्याला कशाचेच भयही वाटत नाही. आपले हे चरित्र खरोखर अतर्क्य आहे! कृपया, आपण आपल्याला योग्य वाटल्यास, मला पडलेल्या या प्रश्नाचे उत्तर द्यावे.' प्रह्लादाने नम्रपणे आणि साक्षेपाने, जिज्ञासापूर्वक विचारलेल्या या प्रश्नाने संतुष्ट झालेल्या परमकारुणिक अत्रिपुत्र दत्तप्रभूंनी, 'सगुण साक्षात्कार होऊनही हा अजून अज्ञानीच आहे' हे जणू जाणूनच कृपापूर्ण स्मित करीत बोलण्यास आरंभ केला. 'दैत्यकुलात जन्मूनही आपल्या भक्तीने नरसिंहाला अवतार घ्यायला लावणारा नारदमुनींचा शिष्य तूच आहेस ना? तुझ्या हृदयांत भगवान नारायणांचा निरंतर निवास आहे आणि तू शुद्ध अव्यभिचारी भक्तीने, सूर्याने अंधार पळवावा तसे, अज्ञान नष्ट करतोस. तूं अंतःकरणाच्या शुद्धीच्या इच्छेने हे प्रश्न विचारीत असल्याने मी तुला सांगतो. ऐक!'

'मी अज्ञानवश दुष्पूर वासनासरितांच्या लाटांत वाहात कर्मगतीने अनेक योनीत फिरत फिरत अखेर स्वर्ग, मोक्ष आणि नरक यांचे द्वार असलेल्या ह्या मनुष्य जन्माला आलो. इथे मी पाहिले की सुखासाठी सर्वच धडपडतात पण त्यांच्या वाटाला दुःखच येते.

**प्रऱ्हादायाप्यात्मतत्त्वं प्राहेदं भगवान् परम् । स्वरूपं सुखमीहोप-रतिस्तनुरशाश्वतान् ।।४२।।**
**दृष्ट्वा भोगान्संविशन्सन् स्वपेन्नेतः परं हितम् ।**

इदं आत्म+तत्त्वं भगवान् प्रऱ्हादाय अपि प्राह। स्वरूपं सुखं इहा+उपरतिः तनुः।४२। भोगान् अशाश्वतान् दृष्ट्वा संविशन् सन् स्वपेत्। इतः परं हितं न।

त्यामुळे **दुःखासारखेच सुखही अनायासच मिळते** असा विचार करून मी सुखासाठी प्रयत्न करण्याचे सोडून दिले. खरे तर स्वरूपतः आपण (आत्मा) सुखरूपच असतो. प्राण आणि धन यांची लालसाच या कष्टमय संसाराचे मूळ कारण आहे. ती घालवण्यासाठी मधमाशी आणि अजगर यांच्याकडून वैराग्य तसेच संतोष देणारे शिक्षण मी घेतले आहे.'

त्याच परमात्म्याच्या ज्ञानाचा उपदेश भगवान दत्तात्रेयांनी प्रह्लादाला केला. 'आपण खरे तर सुखरूपच आहोत. अज्ञानाने अनुभवाला येणारे हे जे दुःख आहे ते आपले वास्तविक स्वरूप नाही. विचार करून पाहिल्यास जिथे जिथे आपण (आत्मा) तिथे तिथे दुःख आहेच असे नाही. म्हणजेच दुःख आगंतुक आहे. ते आत्म्याचे स्वरूप होऊच शकत नाही. झोपेत असतांना किंवा समाधीत असतांना आत्मा साक्षित्वाने विद्यमान असूनही दुःखाचा पत्ताही नसतो. यावरून दुःख हे तापवलेल्या पाण्याच्या उष्णतेप्रमाणे तात्कालिक असते. स्वभावतः पाणी जसे थंड असते तसाच आत्माही सुखरूप आहे. हे अनुभवाला येत नाही त्याचे कारण त्याला अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश ह्या पांच क्लेशांचा अडसर असतो. हे क्लेश नष्ट झाले की आपला स्वाभाविक आनंद आपोआपच प्रकटतो. ह्यांच्यामुळेच आपण निरनिराळ्या वासनांच्या फेऱ्यांत सांपडतो. त्या वासनांचा उपशम झाला की आपले आंतरिक आत्मसुख आपोआपच प्रकटते. पाण्यासाठी व्याकुळलेल्या अभाग्याने शेवाळाने झांकलेले पाणी सोडून मृगजळाच्या मागे धावावे तसे हे लोक आपल्याच अंतरांतला आनंदाचा झरा सोडून सुखप्राप्तीसाठी वायांच धडपडत असतात. क्वचित् काकतालीय न्यायाने

ह्या धडपडीला यश आल्यासारखे वाटले तरी ते वैषयिक सुख मृगजळाप्रमाणे क्षणभंगुर असते. काम आणि अर्थ ह्यांच्या अभिलाषेनेच शोक, मोह, राग, द्वेष आणि श्रम होतात. अशा रीतीने चित्त विचलित झालेल्या पुरुषाला भय आणि चिंता यांच्या योगाने धड झोपही येत नाही. असे **हे ऐहिक भोग, आदि आणि अंत असलेले, क्षणभंगुर, अशाश्वत आहेत तसेच ते परतंत्रही आहेत** हे जाणून मी दैवाने प्राप्त होणाऱ्या भोगांचे सेवन निरिच्छपणे करूनही त्यांच्यासाठी कसलेही प्रयत्न न करतां स्वस्थ पडून राहतो. यदृच्छेने कांहीच न मिळाले तरी दैवानेच सर्व गोष्टी मिळतात असा निश्चय करून धीराने अजगरासारखा झोपून राहतो. यापेक्षां श्रेष्ठ असे दुसरे कल्याणकारक साधन नाही. मधमाशी आणि अजगर यांचे शिष्यत्व स्वीकारून मी प्राणाची तसेच वित्ताची इच्छा टाकून दिली आहे. द्रव्याचा लोभ सोडल्याने मला आता दंड, कर, राजस्व यांच्याद्वारा धन नेणाऱ्या राजाची, चोरांची वा याचकांची भीती उरली नाही. जीवाची आशा सोडल्याने मी हिंस्र प्राणी, शत्रू किंवा काळ यांनाही मुळीच घाबरत नाही. भ्रमर (मधमाशी) जसा निरनिराळ्या पुष्पांतून मिळेल तो रस ग्रहण करतो त्याप्रमाणे मी जास्ती-कमी, रुचकर-रुचीहीन, मानाने वा तिरस्काराने, ताजे-शिळे, रात्री किंवा दिवसा जे अन्न मिळेल त्यांत समाधान मानतो. मधमाशीप्रमाणे संग्रह केल्यास मालकाला मारून ते धन दुसरेच घेऊन जातात हे जाणून मी संग्रह करीत नाही. दैवाने मिळेल ते वस्त्र, वल्कल असो की रेशीम, अंगावर घेतो. कधी भस्मावर, कधी दगडावर तर कधी तरटावर, गावांत वा रानात, मी झोपतो. कधी असा धुळीने माखलेला असतो तर कधी कधी छान आंघोळ करून वस्त्रे आणि अलंकार घातलेला असतो. कधी कधी वस्त्रांशिवायच राहतो. कधी पायी, कधी गाडीत, कधी हत्तीवर तर कधी घोड्यावर बसून फिरतो. कधी मौनी असतो तर कधी वेड्यासारखा वागतो. व्यक्ती तितक्या प्रकृती असतात हे ध्यानात घेऊन मी ना कुणाची निंदा करतो ना स्तुती! (*'नाहं निंदे न च स्तौमि स्वभावविषमं जनम्।'*) परमेश्वराजवळ सर्वांचेच भले चिंतितो. ब्रह्माचीच ओढ, ब्रह्मावरच निष्ठा असलेला मी ब्रह्मरूप आहे आणि सर्वांना ब्रह्मबुद्धीनेच पाहतो. सुसंस्कृत ब्राह्मण, अंत्यज, गाय किंवा श्वान हे मला सारखेच आहेत.' (*'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।।'* भ.गीता ५:१७.)

**हुनेद्विकल्पं चित्तौ तां मनस्यर्थभ्रमे तु तत् ।।४३।।**
**वैकारिके तं मायायां तां स्वस्मिन्विरमेत्ततः । इत्युक्त्वा विररामाजः प्रऱ्हादोऽप्यभवत्तथा ।।४४।।**

विकल्पं चि;त्तौ हनेत् । तां अर्थ +भ्रमे मनसि (हुनेत्) तत् तु.. ।४३। वैकारिके (हुनेत्) तं मायायां (हुनेत्) । तां स्वस्मिन् (हुनेत्) प्रऱ्हादः अपि तथा अभवत्।४४।

आतां दत्तप्रभू हा स्वरूपानंद कसा प्राप्त करायचा तो योग सांगत आहेत. 'प्रथम विकल्पाचा चित्तांत लय करावा. ते चित्त मग विषयांत भुलणाऱ्या मनात स्थिरवावे. त्या मनाचा वैकारिक अहंकारांत (पर्यायाने बुद्धीत अथवा विज्ञानमय कोशांत) लय करावा. ती बुद्धी महत्तत्त्वसहित मायेत स्थिरवावी. शेवटी त्या मायेचा आत्म्यांत (**स्वस्मिन्**) विलय करावा. **विकल्प** म्हणजे इंद्रिये आणि **चित्ति** म्हणजे त्यांची विषयाकडची धांव. पहिल्यांदा इंद्रियांना विषयांपासून वळवून मनांत स्थिर करावे. हाच पतंजलींनी सांगितलेला **प्रत्याहार** होय. त्यानंतर ते विषयरहित झालेले मन बुद्धीत विरवावे. हीच **धारणा**. ही स्थिरावलेली बुद्धी महत्तत्त्वांत आणि मायेत विरवावी (**ध्यान**) आणि अंती ती माया आत्मस्वरूपांत स्थिर करावी (**समाधी**). इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, अव्यक्त (महत्, माया) आणि पुरुष ही परंपरा कठोपनिषदांत (१:३:१०) स्पष्ट केली आहे. हीच प्रक्रिया तेथे पुढीलप्रमाणे सांगितली आहे. 'सूज्ञ माणसाने वाचेचा (इंद्रियांचा) संयम मनांत करावा; त्या मनाचा बुद्धीत (*'ज्ञानआत्मनि'*), त्या बुद्धीचा महत्तत्त्वात आणि महत्तत्त्वाचा लय प्रशांत अशा आत्मतत्त्वात करावा (१:३:१३). 'इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, महत्तत्त्व, आणि आत्मा हे एकापेक्षा एक सूक्ष्म, व्यापक आणि आंतरिक आहेत. अशा रीतीने हा अनात्म पदार्थांचा अनुक्रमाने विलय श्रुतीने *'सा काष्ठा सा परा गति'* महणून प्रतिपादलेल्या आत्मरूपांत करावा. 'तो नित्य, शुद्ध, बुद्ध, सर्वभेदातीत परमात्माच मी आहे' हे पक्के झाले की संसारातून मुक्त होशील. हे माझे गूढतम हृदयच मी तुझ्यापुढे उघडे केले आहे. त्याचे सावधानतेने मनन कर. हे माझे हार्द अत्यंत नम्र आणि श्रद्धावंतालाच सांगावे.' हे स्वतःला हृदयांत सामावणारे रहस्य सांगून दत्तप्रभू निःशब्द झाले. प्रह्लादही त्या उपदेशाने प्राप्त झालेल्या अनुभवाने तसाच - निःशब्द आणि तटस्थ झाला.

## देवोऽर्जुनायापि योगं प्राहाष्टाङ्गं निवृत्तये । सद्वाच्याविद्याशबल-ब्रह्मातोऽव्यक्तकं महत् ।।४५।।

देवः अर्जुनाय अपि निवृत्तये अष्टाङ्ग+योगं प्राह। सत्+वाच्य अविद्या+शबल+ब्रह्मातः अव्यक्तकं, (अव्यक्तात्)महत् ।४५।

आतां कार्तवीर्य अर्जुनाचा अनुग्रह सांगत आहेत. देव याचा अर्थ द्योतनात्मक म्हणजेच स्वयंप्रकाश दत्तप्रभू असा आहे. 'त्याच्या प्रकाशानेच हे सर्व उजळलेले आहे,' या मुंडकोपनिषदाच्या (२:२:१०) आणि 'जे सूर्य, चंद्र आणि अग्नी यांच्यांत प्रविष्ट झालेले तेज आहे ते माझेच आहे' ह्या गीतावचनाचा (१५:१२) हाच अभिप्राय आहे. कार्तवीर्याला संसारातून निवृत्त होण्यासाठी दत्तप्रभूंनी अष्टांगयोगाचा उपदेश केला. त्यांपैकी, पातंजल दर्शनानुसार अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम आणि तप, संतोष, शौच, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान हे पांच नियम ही पहिली दोन अंगे आहेत. शांडिल्य उपनिषदांत आणि सूतसंहितेत अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, आर्जव, क्षमा, धृति (धैर्य), मिताहार, शौच हे दहा यम तसेच तप, संतोष, आस्तिक्य, सिद्धान्तश्रवण, ईश्वरपूजन, दान, ह्री (लज्जा), मति (सद्बुद्धी), जप आणि व्रताचरण हे दहा नियम मानले आहेत. ह्यांची लक्षणे विस्तारभयाने दिली नाहीत. ती त्या त्या ग्रंथांतून पाहावीत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे. कुणी यम आणि नियम हे स्वाभाविक मानवधर्म असल्याने उरलेली सहाच अंगे मानून 'षडंग' योगाचे प्रतिपादन करतात तर कुणी समाधी हे योगाचे फळ मानून 'सप्तांग' योगाचे प्रतिपादन करतात. ह्या ठिकाणी भगवंतांनी, समाधीचे सविकल्प आणी निर्विकल्प असे दोन भाग करून, एकाचा समावेश अंगांत करून 'अष्टांग' योगाचा उपदेश केला आहे.

**निवृत्तये** या शब्दांतून अध्यारोपजनित संसाराचा अपवादाने निरास करून त्यापासून मुक्त होणे हा अर्थ सुचविला आहे. ह्या अध्यारोपाचे स्पष्टीकरण पुढे सत् या पदापासून *'सदेव सोम्य इदमग्र आसीत्'* ह्या छांदोग्य उपनिषदाच्या वचनाद्वारे सांगितले आहे. सत् म्हणजे जो सदैव, तिन्ही काळात असतो तो, म्हणजेच आत्मा होय.

**ततस्ततोऽहङ्कारोऽस्मात् पञ्चतन्मात्रखाद्यतः । जगत्सकार्यविकृत-भूतान्युर्वात्मवर्ष्म तत् ।।४६।।**

ततः अहङ्कारः, अस्मात् ख्आदि पञ्च+तन्मात्र, अतः जगत् । स+कार्य+विकृत+भूतानि उरु+आत्म+वर्ष्म । तत् ।४६।

छांदोग्यातच पुढच्या अनेक मंत्रांत सदेव न म्हणता *'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किञ्चन मिषत्'* असे म्हटले आहे. यावरून देश, काल, वस्तू या त्रिविध परिच्छेदविरहित आत्माच 'सत्' शब्दाने अभिप्रेत आहे. 'अतति' सर्वत्र जाणारा किंवा सर्वांना व्यापणारा तो आत्मा. त्यालाच नित्य, शुद्ध, बुद्ध इत्यादि लक्षणांचे निरतिशय ब्रह्म ('बृह' धातूपासून वाढणारे) म्हणतात. प्रलयकाली आधीच्या सृष्टीतील सर्व प्राणिमात्रांनी केलेली पण परिपक्व न झालेली कर्मे, मायाविशिष्ट ब्रह्मात राहून हळूहळू पचत (पिकत) असतात. त्या कर्मांनाच अविद्या म्हणतात. आणि त्यांनी युक्त असलेल्या ब्रह्माला 'अविद्याशबलब्रह्म' म्हणतात. हीच कर्मे परिपक्व झाली की त्यांचा भोग देण्यासाठी ह्या ब्रह्माला पुन्हा जगत् निर्माण करण्याची इच्छा होते. हाच ऋग्वेदांत (१०:१२९:४) प्रतिपादलेला सर्वप्रथम प्रकटणारा 'काम म्हणजेच मनाचे बीज' होय. हेच शबलब्रह्म जगाचे अभिन्न निमित्त आणि उपादान कारण आहे. हेच स्वतःपासूनच जग निर्माण करते. घटाला जसे माती हे उपादान कारण आहे आणि कुंभार हे निमित्त कारण आहे तशी दोन कारणे सृष्टीला नाहीत. ह्या ब्रह्मापासून अव्यक्त म्हणजे माया जन्म घेते आणि मायेपासून महत् नांवाचे तत्त्व निर्माण होते. महत्तत्त्वापासून अहंकार, अहंकारापासून पंचतन्मात्रासहित आकाश, वायू, तेज, आप आणि पृथ्वी ही पंचमहाभूते उत्पन्न होतात. आतां कुणी विचारतील की तैत्तिरीय उपनिषदात (२.१.१) तर 'आत्म्यापासून आकाश संभवते' असे म्हटले आहे. तर अव्यक्त शब्दाने दर्शविलेली माया ब्रह्माची शक्तीच आहे. तिला स्वातंत्र्य नाही. 'न तस्य कार्यं कारणं च विद्यते' असे श्वेताश्वतरोपनिषदांत म्हटलेच आहे. इथे अव्यक्तांतच अंतर्भूत असलेल्या महत् आणि अहंकार यांचा स्पष्ट वेगळा उल्लेख केला आहे एवढेच. आत्म्यापासून आकाश जन्म घेते या श्रुतिवाक्याशी कसलाच विरोध नाही.

आरंभवाद आणि परिणामवाद यांचे खंडन इथे विस्तारभयाने केले नाही. हे सर्व ब्रह्मसूत्रभाष्याच्या दुसऱ्या अध्यायात पाहावे.

**जागृतिर्गोभिरर्थाप्तिर् विश्वस्तदभिमानवान् । सकार्यशुद्धभूतानि लैङ्गात्मात्मा स भौतिकः ।।४७।।**
**हिरण्यगर्भः स्वप्नः स्यात् करणोपरमेऽर्थयुक् । प्राक्संस्कारोत्थानुभूतिस् तैजसोऽत्राभिमानवान् ।।४८।।**

गोभिः अर्थ+आप्तिः जागृतिः । विश्वः तत्+अभिमान+वान् । स+कार्य+शुद्ध+भूतानि लैङ्ग+आत्मा सः भौतिकः ।४७। हिरण्य+गर्भः स्वप्नः स्यात् करण+उपरमे+अर्थ+युक् । प्राक्+संस्कार+उत्थ+अनुभूतिः तैजसः अत्र+अभिमान+वान् ।४८।

अगदी शेवटच्या कार्यापर्यंत आत्माच सर्वांचे उपादान कारण असल्याने अव्यक्तापासून म्हणजे अव्यक्तभावाला प्राप्त झालेल्या आत्म्यापासून असे समजावे. आकाशादि पांच महाभूतांपासून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणांची वाढ झाली. म्हणून पंचमहाभूतांपासून जगत् झाले. **कार्या**सहित म्हणजेच विषयांसहित **विकृत** म्हणजे पंचीकृत भूतांपासून स्थूल देह (**'उरुवर्ष्म'**) आणि विराट (**'तत्'**) उत्पन्न झाले.

या स्थूल देहांत **'गो'** म्हणजे इंद्रियांपासून **'अर्थाप्ति'** म्हणजे विषयांचे ग्रहण ज्या अवस्थेत होते ती जागृती अवस्था होय. स्थूल देह आणि जागृती यांचा अभिमानी जीवाला **'विश्व'** म्हणतात. शुद्ध म्हणजे अविकृत, अपंचीकृत महाभूतें आणि त्यांची कार्ये पंचतन्मात्रा यांचा मिळून आत्म्याचा लिंगदेह, ज्याला सूक्ष्म देह असेही म्हणतात, तो होतो. तो स्थूलदेहाप्रमाणेच भौतिक (भूतांपासून झालेला) आहे.

समष्टीच्या लिंगदेहालाच **हिरण्यगर्भ** असे नांव आहे. इंद्रियांचा उपशम झाला की हा सूक्ष्म देह पूर्वीच्या (**प्राक्**) जागेपणीच्या संस्कारांच्या स्मृतीने विषयांचा अनुभव घेतो. तीच **स्वप्ना**वस्था होय. लिंगदेह आणि स्वप्नावस्था यांच्या अभिमानी जीवाला (जाग्रतीतल्या विश्वालाच) **'तैजस'** असे नांव आहे. बृहदारण्यकांत (४.३.९) या अवस्थेत पुरुष (जीव) स्वयंप्रकाश होतो, स्वप्नांतील सृष्टीची रचना तोच करतो असे म्हटले आहे.

**द्विहेत्वात्मावित्साभासा-ऽव्याकृतं ज्ञानसंहृतिः । धीहेत्वात्मस्थितिः सुप्तिर्मानी प्राज्ञोऽत्र तत्परम् ।।४९।।**

द्वि+हेतू आत्म+अवित्स +आभासा अव्याकृतम् । धी+हेतु+आत्म+स्थिति सुप्तिः । अत्र प्राज्ञः । तत्+परं।४९।

ह्या दोन (**'द्वि'**) देहांचे कारण (**'हेतू'**) असणारे आत्म्याचे अज्ञान (**'आत्म+अवित्'**) आणि आभासरूप जीव (**'स+आभासा'**) यांना **अव्याकृत** ही संज्ञा आहे. अस्पष्ट दशेत असलेले म्हणजे अव्याकृत. स्पष्टपणे व्यक्त न झालेले, आकाराला न आलेले ते अव्याकृत! *'तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्'* (बृहदारण्यक उ. १.४.७) ह्या श्रुतीप्रमाणे उत्पत्तीच्या पूर्वीं जग अव्याकृत असते. त्या वेळी पंचभूतादींचे हे जग सत्याचे अधिष्ठान जे ब्रह्म त्यांत रोंवलेले असते. ह्याचा आत्मतत्त्वाच्या ज्ञानाने लय होत असल्याने त्याला 'सत्' म्हणजे खरे म्हणतां येत नाही, पुढे दृश्य स्वरूपांत व्यक्त होणार असल्याने 'असत्' म्हणजे खोटे म्हणतां येत नाही. सत् आणि असत् हे परस्परविरोधी धर्म असल्याने त्याला 'सदसत्' असेही म्हणतां येत नाही. आत्मस्वरूपापासून त्या अव्याकृताला भिन्न म्हणावे तर द्वैत मानावे लागते आणि आत्म्याच्या श्रुतिप्रतिपादित अद्वितीयत्वाला बाध येतो. त्याला आत्म्याशी अभिन्न मानले तर त्यांच्यासारखा आत्माही जड ठरतो. भिन्न आणि अभिन्न ह्या दोन्ही परस्परविरोधी स्थिती एकत्र असूं शकत नाहीत म्हणून त्यांना भिन्नाभिन्नही म्हणतां येणार नाही. हे अव्याकृतच पुढे जगात परिणत होत असल्याने त्याला निरवयव म्हणतां येत नाही. आकाशादि निरवयवांचीही उत्पत्ती त्यापासून होत असल्याने त्याला सावयवही म्हणतां येत नाही. अशा रीतीने अव्याकृताला **अनिर्वचनीय** म्हणावे लागते. तेसुद्धा ब्रह्माशी ऐक्याच्या ज्ञानाने नाहीसे होते. हाच **कारणदेह** होय. सर्व प्रकारच्या ज्ञानांचा उपसंहार (**ज्ञानसंहृतिः**) होऊन बुद्धी (**धियो**) कारणदेहात स्थिरावते ती सुषुप्ती (**निद्रा**) अवस्था जाणावी. कारणदेह आणि सुषुप्ती यांचा अभिमानी झालेला जीव **प्राज्ञ** म्हणवतो. तैजसाचाच सुषुप्तीत प्राज्ञ होतो. इथे स्पष्टपणे सांगितलेला नसला तरी विश्व, तैजस आणि प्राज्ञ यांच्यातला अभेद लक्षांत घेतला आहे. जगाच्या कारणरूपाने प्राज्ञ नांवाच्या आत्म्याचे चिंतन करावे (*'जगत्कारणरूपेण प्राज्ञात्मानं विचिन्तयेत्।'*) असे श्रीमच्छंकराचार्यांच्या पंचीकरणावरील वार्तिकांत (श्लोक ४५). **तत्परं** हे पद पुढच्या श्लोकाला जोडून वाचावे.

**शुद्धादिलक्ष्मचिन्मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते । यमादिवान्पीठवित्सद्-गुरूक्त्यापूर्य चेडया ।।५०।।**

(तत्+परं) शुदाध+आदि+लक्ष्म+चित्+मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते यम+आदि+वान् पीठ+वित् सत्+गुरु+उक्त्या चेड्या आपूर्य.. ।५०।

बुद्धी कारणदेहांत स्थिरावली की वृत्ती उठत नाहीत. वृत्तींवर बुद्धीचा प्रभाव असतो तसाच बुद्धीच्या साक्षीचा - प्रत्यगात्म्याचाही, असतो. बद्धीतून उद्भवणाऱ्या सर्व वृत्ती तापलेल्या लोखंडाच्या ठिणग्यांसारख्या आत्म्याच्या चैतन्याच्या स्पर्शाने तेजाळलेल्या असतात (तैत्तिरीय उ. भाष्यवार्तिक). अशी ही बुद्धी वटवृक्ष जसा वडाच्या बीजांत सामावावा तशी कारणदेहांत सामावून राहते. आतां त्यांच्या म्हणजे जाग्रती, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या पलीकडे असलेले शुद्ध, बुद्ध, नित्य इत्यादि लक्षणांनी युक्त असे चैतन्यमात्र ब्रह्म गुरूंनी उपदेशिलेल्या *'तत्त्वमसि'* (ते ब्रह्म तू आहेस) ह्या महावाक्याने लक्षिले जाते.

श्लोकाच्या उत्तरार्धापासून हठयोगाचे निरूपण केले आहे. **यमनियम** अंगी बाणविलेल्या आणि आसनाचा जय केलेल्या साधकाने गुरूंच्या निर्देशाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली पुढे सांगितलेल्या प्राणायामाचा अभ्यास करावा. कठोपनिषदांतील (१.२.९) सिद्धांताप्रमाणे आपली 'बुद्धी चालवून योगाभ्यास करूं नये'. *'ईडया आपूर्य'* ही पदे पुढच्या श्लोकाशी जोडून वाचावीत.

**ईडा** या डाव्या नाकपुडीने बाहेरचा प्राण जोराने आंत ओढून पूरकाच्या चौपट काळ जालंधरबंधाने (गळा छातीशी दाबून घरून) पोटांत धरून ठेवावा, म्हणजेच **कुंभक** करावा. हा कुंभक जपसहित वा नुसता (जपरहित) करतां येतो. नंतर दुसऱ्या म्हणजे उजव्या **पिंगला** नाडीद्वारा उड्डियान बंध लावून (पोट आंत ओढून), हळूंहळूं प्राण बाहेर सोडावा, म्हणजेच **रेचक** करावा. वेगाने किंवा जोरांत रेचक केल्यास बलहानी होऊ शकते. दुसरा प्राणायाम उलट रीतीने, म्हणजे पिंगलेने पूरक आणि इडेने रेचक करावा. नंतर पुन्हां पहिल्यासारखा असे दहा कुंभक दिवसांतून तीन वेळां करीत गेल्याने तीन महिन्यांत प्राणजय होतो. जिंकलेल्या प्राणाने इंद्रिये विषयांपासून मनांत बांधावी. हा **प्रत्याहार** होय.

**धारयेदात्मन्यचलं विक्षिप्तं शश्वदात्मनि । स्थिरीकुर्वन्छ्रुतं ध्यायेच्छ्रुतियुक्त्या निरासतः ।।५२।।**
**विजातिप्रत्ययस्यान्य-प्रवाहीकरणं भजेत् । गुरूक्तं षड्लिङ्गवित्तं तं भागत्यागलक्षितम् ।।५३।।**

आत्मनि अचलं धारयेत् । विक्षिप्तं शश्वत् आत्मनि स्थिरीकुर्वन् श्रुतं ध्यायेत् । श्रुति+युक्त्या निरासतः... ।५२। (श्रुति+युक्त्या निरासतः) विजाति+प्रत्ययस्य अन्य+प्रवाही+करणं भजेत् । गुरु+उक्तं षड्+लिङ्ग+वितं भाग+भाग+त्याग+लक्षितं ।५३।

चित्त स्थिर करून नाभ्यादि देशांत धरून ठेवावे. मग ते मन *'देशबन्धश्चित्तस्य धारणा'* या पतंजलींच्या वचनानुसार हीच **धारणा** होय. दैवयोगाने मन विक्षिप्त (चंचल) होऊन विषयांत गुंतले तर सारखा पुनःपुन्हा अभ्यास करून ते स्थिर करावे आणि गुरूंकडून श्रवण केलेल्या तात्पर्याचे, आत्मस्वरूपाचे ध्यान करावे.

**तात्पर्यनिर्णयाचे सहा निकष -** श्रुतींना, वेदांना अनुकूल अशा युक्तीने, तर्काने द्वैताच्या संस्कारांचे निरसन करीत, गुरुमुखांतून श्रवण केलेल्या, उपनिषदांत प्रतिपादलेल्या, अद्वैत आणि प्रत्यगात्म्याशी एकरूप असलेल्या परब्रह्म स्वरूपाच्या अनुभूतीत प्रवाहित करावे. गुरूंनी वेदांतवाक्याने उपदेशिलेले ब्रह्मरूप वेदांताच्या अभ्यासानेच जाणून घ्यावे, कारण *'तत्तु समन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार वेदांतांतच ब्रह्मरूपाचे प्रतिपादन आहे. या गुरूपदिष्ट ब्रह्मरूपाचे तात्पर्य श्रीमदादिशंकराचार्यांनी सांगितल्याप्रमाणे उपक्रमादि सहा लिंगांच्या आधारेच करावे. *'उपक्रमोपसंहारावभ्यासोऽपूर्वता फलम्। अर्थवादोपपत्तौ च लिङ्गं तात्पर्यनिर्णये।'*. छांदोग्योपनिषदांत ब्रह्माविषयी केलेल्या प्रतिपादनांत 'सदेव सोम्य' असा 'उपक्रम' करून (६.२.१) *'स आत्मा तत्त्वमसि'* असा 'उपसंहार' केला आहे हे पहिले लिंग (१). वरचेवर अनेक वेळां आलेले 'तत्त्वमसि' (ते ब्रह्म तू आहेस) हे वाक्य म्हणजे अभ्यास नांवाचे लिंग आहे (२). शब्दावांचून (प्रत्यक्ष, अनुमान आदि) अन्य प्रमाणानी त्या ब्रह्माचे ज्ञान होत नाही ही 'अपूर्वता' हे तिसरे लिंग आहे (३). हा एक आत्मा जाणला की सर्व जाणले जाते हे 'फल' होय (४). जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय, त्यांत प्रवेश आणि त्याचे नियमन हे पांच 'अर्थवाद' होत (५). मृत्तिका, सुवर्ण आदि दृष्टांत हे उपपत्ती नांवाचे सहावे लिंग आहे (६).

**तत्त्वमस्यादिवाक्यार्थं सोऽहमात्मेत्यभेदतः । नादेयं नश्वरं चित्तं लये सम्बोधयेत्पुनः ।।५४।।**

भाग+त्याग+लक्षितं तत्+त्त्वं+असि+आदि+वाक्य+अर्थम् सः अहं आत्मा इति अभेदतः नश्वरं न आदेयम्। लये पुनः सम्बोधयेत्।५४।

पुराणातही (बृहत्संहिता) 'गुरुमुखांतून वेदांतवाक्यांचे श्रवण केल्यावर उपक्रमादिलिंगांनी त्यांच्या तात्पर्याचा निश्चय करावा. नंतर त्या वाक्याच्या अनुसंधानाने तो अर्थ ग्रहण करणारे मनन करावे. श्रवण आणि मनन यांच्यातील एकाग्रता म्हणजे निदिध्यासन. आत्मज्ञान उत्पन्न होण्यासाठी बुद्धिमान साधकाने विविध तर्कांनी तटस्थ आणि 'अतत्' संस्कारांची व्यावृत्ती करीत, अंतरंग श्रवण, मनन आणि चिंतन ही केली पाहिजेत. तसेच शमदमादि षटकाचाही अभ्यास करावा.' ह्याच श्रवण-मनन-निदिध्यासनांचा निर्देश कहोळ ब्राह्मणात याज्ञवल्क्यांनी 'पांडित्य, बाल्य आणि मौन' या शब्दांनी केला आहे. 'बाल्य' याचा बालवय किंवा निर्बंध स्वैराचार असा होऊ शकत नाही कारण हे दोन्ही मननाला उपयोगी तर नाहीतच पण प्रतिबंधकच आहेत. *'अनाविष्कुर्वन्नन्वयात्'* ह्या ब्रह्मसूत्रानुसार (३.४.५०) राग, द्वेष, मान, अपमान ह्यांच्या प्रभावाने होणाऱ्या बाह्य प्रवृत्तीचा त्याग करून निरागस, शुद्ध भावांत राहण्याला बाल्य म्हटले आहे. 'ब्राह्मणाने (श्रवणाने) पांडित्य पूर्णपणे संपादन करून (मननाचा अभ्यास करीत) 'बाल्य'त्वाने राहावे. बाल्य आणि पांडित्य आत्मसात केल्यावर (निदिध्यासनासाठी) 'मौन' धरावे.' (बृहदारण्यक उ. ३.५.१). यांत मौनाचा ब्रह्मसूत्रानुसार (३.४.४७) विध्यात्मक अर्थ घ्यावा. अंतःकरणातून बलिष्ठ भेदवासनांचा प्रभाव नाहीसा करण्यासाठी ज्ञानाभ्यास निरंतर चालविण्यासाठी निदिध्यासनात्मक मौन धारण करायचा विधि सांगितला आहे. ध्यान वरचेवर करावे लागते. म्हणजे त्याची आवृत्ती करावी लागते. कोंडा बाजूला होईपर्यंत साळी कांडाव्या लागतात त्याचप्रमाणे ब्रह्मसाक्षात्कार होईतोंवर *'आवृत्तिरसकृदुपदेशात्'* या ब्रह्मसूत्राला (४.१.१) अनुसरून श्रवणादींची आवृत्ती आवश्यकच आहे. *'भागत्यागलक्षितम्'* हे पद पुढच्या श्लोकांतल्या 'तत्त्वमस्यादिवाक्यार्थम्' या पदाचे विशेषण आहे.

भागत्यागलक्षणेने सूचित होणाऱ्या 'ते तू आहेस' या वाक्याचे 'तो (आत्मा) मी आहे' असे अभेदतया चिंतन करावे. शब्दाचा अर्थ तीन प्रकारे लावतां येतो, मुख्य, गौण आणि लक्षणा. ब्रह्म हे अनिर्वचनीय असल्याने त्याचा मुख्य किंवा गौण अर्थ लावतां येत नाही. यासाठी लक्षणा वृत्तीनेच अर्थ लावला पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत 'ते' व 'तू' या पदांची समानता ('सामानाधिकरण्य') दिसते. श्रीमच्छंकराचार्यांनी वाक्यवृत्तीत (४७) सांगितल्याप्रमाणे मुख्यार्थ घेतल्याने जर प्रमाणाशी विसंगत अर्थ निघत असेल, मुख्यार्थाविना येणाऱ्या प्रतीतीला लक्षणा म्हणतात. म्हणजेच 'तत्' आणि 'त्वं' पदांचा परस्परसंबंध 'लक्ष्य' आणि 'लक्षणा' असा होतो. लक्षणा तीन प्रकारची असते. जहती, अजहती आणि भागत्याग (*जहत्यजहती*). ज्या वेळी मुख्यार्थ पूर्णपणे सोडून वेगळाच अर्थ काढला जातो तिला *'जहल्लक्षणा'* असे म्हणतात. उदाहरणार्थ गंगेतला गोठा (*'गंगायां घोषः'*) इथे वाहत्या नदीत गोठा असूं शकत नाही. म्हणून गंगेचा नदी हा अर्थ सोडून नदीचा कांठ असा अर्थ घेतल्यावर तो बरोबर जुळतो. लक्षणेच्या दुसऱ्या प्रकारांत मुख्यार्थाला जोडून आणखी अर्थ घ्यावे लागतात. ही 'अजहल्लक्षणा' होय. उदाहरणार्थ 'कावळ्यापासून अन्न राख' याचा अर्थ केवळ कावळेच नाही तर इतर सर्व प्राण्यापासूनही अन्नाचे रक्षण करावे असा केला पाहिजे. अन्यथा कावळे सोडून इतर प्राण्यांना अन्न खाऊ द्यायला मोकळीक आहे असा अर्थ निघेल. ह्या दोन्ही लक्षणा महावाक्याला लागत नाहीत. कारण ते आणि तू या पदांचे लक्ष्यार्थ एक असू शकत नाहीत आणि सर्वथा वेगळेही असू शकत नाहीत. यासाठी दोन्ही पदांचे समान अंश ग्राह्य धरून असमान अर्थ टाकले तर 'लक्ष्यार्थ' स्पष्ट होतो. जुना मित्र अनेक वर्षांनी भेटला की त्याची ओळख पटण्यासाठी 'तो हा देवदत्त' असे सांगावे लागते. फार पूर्वी दूरदेशी तरुणावस्थेत ज्याच्याशी मैत्री झाली तोच हा वृद्ध आत्तां इथे भेटतोय असा त्याचा अर्थ होतो. त्याचे वय, रूप, स्थान इत्यादि वेगळे आहेत पण नांव आणि मित्रत्व तसेच आहेत. अशा भिन्न किंवा विसंगत अर्थ सोडून उरलेल्या समान आणि सुसंगत अर्थांनी ओळख पटते. 'ते तू आहेस' या वाक्यात 'ते' पदाचा अर्थ मायेत प्रतिबिंबित झालेला ईश्वर आणि मायेचे अधिष्ठान ब्रह्म, असा वाच्यार्थ आहे आणि सत्य, ज्ञान, अनंत इत्यादि लक्षणांनी निर्दिष्ट चैतन्य हा 'लक्ष्यार्थ' आहे. 'तू' पदाने अविद्या, तिच्यात

प्रतिबिंबित झालेला जीव आणि अविद्येचे अधिष्ठान कूटस्थ चैतन्य हा वाच्यार्थ आणि साक्षीभूत चैतन्य हा लक्ष्यार्थ आहे. वरील देवदत्ताच्या उदाहरणाप्रमाणे इथे 'ते' आणि 'तू' या पदांचे वाच्यार्थ भिन्न असले तरी लक्ष्यार्थ निःसंशय एकच आहे. वस्तुतः ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला अंतःकरणाच्या उपाधींमुळे दुःखादि सांसारिक धर्म चिकटलेले भासतात.

**सोऽहमात्मेत्यभेदतः -** हा विरोध वास्तविक नसल्याने 'तो(च) मी आहे' असा त्यांचा अभेदच आहे. ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) श्रुतींनीही आत्मा शब्द ब्रह्म ह्या अर्थानेच स्वीकारला आणि प्रतिपादला आहे. अशा प्रकारें मनन आणि निदिध्यासन केल्यानेच आत्मसाक्षात्कार होतो. यावर असा आक्षेप घेतां येईल की वेदानुसार (केनोपनिषद १.५) तर आत्मा मनाचा विषय होऊं शकत नसल्याने त्याचे मनन कसे होईल? स्वयंप्रकाश आत्म्याला मन प्रकाशत नाही हे खरेच आहे. पण हा निषेध फक्त फलव्याप्तीचा आहे. इतर वस्तूंच्या मननाने ती वस्तू मनांत आकारते. हीच फलव्याप्ती. पण आत्मज्ञानासाठी वृत्तिव्याप्तीच पुरेशी आहे. अंधारांत पडलेली दोरी पहायला दिवा लागतो. दिवा मात्र इतर प्रकाशाच्या साधनाविना दिसतो. तसाच आत्म्याचा प्रकाश मनांत पडल्याने तो जाणवतो. ह्यालाच 'वृत्तिव्याप्ती' असे म्हटले आहे. त्यामुळेच बृहदारण्यक उपनिषदांत आत्मा 'मनानेच पाहावा' असे या अर्थानेच म्हटले आहे. पंचदशीतही (७.९२) म्हटले आहे, 'ब्रह्माच्या अज्ञानाचा नाश करण्यासाठी वृत्तिव्याप्तीचीच अपेक्षा आहे. ब्रह्म स्वतःच (अंतःकरणात) स्फुरत असल्याने त्याचा आभास होऊंच शकत नाही.' अभेदतः ह्या शब्दाने जीवात्मा (प्रत्यक्) आणि (पर)ब्रह्म यांची अखंडैकरसता सुचविली आहे. वाक्यवृत्तीत (३९-४१) सांगितल्याप्रमाणे, 'प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार अद्वितीय आणि आनंदघन असाच होतो. अद्वयानंदस्वरूप ब्रह्म हेच प्रत्यग्बोधाचे लक्षण आहे. आत्मा आणि ब्रह्म यांचे असे परस्पर तादात्म्य पक्के झाले की 'त्वं' पदाच्या अर्थाचे (जीवाचे) ब्रह्मापासून वेगळेपण आणि 'तत्' पदाची परोक्षताही तत्काल दूर होतात. तदनंतर जीवात्म्याची जाणीव पूर्णानंद अद्वितीय रूपानेच स्थिर होते.' जीवात्मा आणि परमात्मा यांचे अखंड एकरसत्व केवळ परस्पर तादात्म्यानेच सिद्ध होत नाही ह्या आक्षेपाचे निराकरण करण्यासाठी नीलकमलाचा

दृष्टांत देतात. नील आणि कमल ह्या दोन पदांत 'नील' हे विशेषण व 'कमल' हे विशेष्य असून त्यांचा मिळून अर्थ 'निळ्या रंगाचे कमळ' असा होतो. हे त्यांचे तादात्म्य असले ते अखंडैकरस नाहीत. नील हा गुण आहे आणि कमल हे द्रव्य आहे, हा भेद कायमच आहे. तसाच आत्मत्व आणि ब्रह्मत्व ह्यांच्यातला भेद राहणारच असे म्हणाल तर ते तसे नाही. नीलता ही कमळाशिवाय मेघ आणि इतर वस्तूंतही आढळते. तसेच कमळ हे लाल, पांढरे असे इतर रंगाचे असूं शकते. अर्थात् त्यांच्या अर्थांतच भेद असल्याने अखंडार्थ होऊं शकत नाही. आत्मत्व आणि ब्रह्मत्व हे मात्र एकमेकांशिवाय कुठेच आढळत नाही. विश्वरूपाचार्यांनी वाक्यवृत्तीत म्हटल्याप्रमाणे, 'आत्मता ही ब्रह्माशिवाय अन्य ठिकाणी आढळत नाही आणि ब्रह्मता आत्म्यावांचून कुठेच दिसत नाही. नीलोत्पलापेक्षां हे विलक्षण आहे.'

**नादेयं नश्वरं -** समाधीलाभासाठी ध्यानमार्गाचा अभ्यास करणाऱ्याला अष्टमहासिद्धींचे ऐश्वर्य हे विघ्नच आहे. त्याचा अंगीकार करूं नये.

**चित्तं लये सम्बोधयेत्पुनः -** ध्यानाभ्यास करतांना तमोगुणामुळे कदाचित् चित्ताचा लय होऊं लागला - झोंप येऊं लागली, तर त्याला पुनश्च जागवावे.

**विक्षिप्तं शमयेज्जह्यात् सकषायं समं वरम् । नास्वादयेद्रसं तत्र निःसङ्गः प्रज्ञया भवेत् ।।५५।।**
**निवातदीपवच्चित्तो ब्रह्मात्मा शून्यवृत्तिकः । कृतकृत्यः क्षीणकर्मा भिन्नहृद्ग्रन्थिसंशयः ।।५६।।**

निवात+दीपवत्+चित्तः ब्रह्म+आत्मा शून्य+वृत्तिकः कृत+कृत्यः क्षीण+कर्मा भिन्न+हृत्+ग्रन्थि+संशयः।५६।

**विक्षिप्तं शमयेत्** इतर विषयांच्या ओढीने चित्त चंचल झाले तर त्या विषयांचे चिंतन सोडून ते शांत करून परत ध्यानांत लावावे; **सकषायं जह्यात्** वासनांनी मलिन झाले तर त्या वासनांचा त्याग करावा. **समं वरम्** विक्षेप आणि कषाय यांनी रहित असेल तर उत्तमच! तेच ध्यानांत स्थिर करावे. **रसं न आस्वादयेत्** त्या ध्यानाच्या अवस्थेत जो आनंद स्फुरतो त्याच्या आस्वादांत रमूं नये. त्याच्यापुढे जायचे आहे हे लक्षांत ठेवावे. अशा रीतीने साक्षात्कार होईपर्यंत ध्यान स्थिर करून (**प्रज्ञया निःसङ्गः भवेत्**) बुद्धीने निःसंग व्हावे.

अशा प्रकारे ध्यानाभ्यास करीत निवातीच्या दिव्यासारखे मन स्थिर करावे. हीच समाधी! पंचदशीत (१:५५) सांगितल्याप्रमाणे ध्याता आणि ध्यान ह्यांचा विसर पडून केवळ ध्येयाचेच भान राहून मन निवातीच्या दीपज्योतीप्रमाणे स्थिर होण्यालाच समाधी असे नांव आहे. श्रीमद्भवद्गीतेतही (६:१९) *'यथा दीपो निवातस्थो नेऽङ्गते सोऽपमा स्मृता'* असेच समाधीचे वर्णन केलेले आहे. पतंजलींनी *'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्'* या सूत्रांतून (१:३) ह्याच अवस्थेचा निर्देश केला आहे. **ब्रह्मात्मा** म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदाच्या वचनानुसार (४:४:६) ब्रह्मरूप होऊन ब्रह्मांत मिळून जाणे. हाच अभ्यास पक्का झाला की वृत्तींचा पूर्ण लोप होतो (**शून्यवृत्तिकः**). अशा रीतीने आत्मज्ञानाने गीतावाक्याप्रमाणे (१५:२०) जीव कृतकृत्य होतो. असे हे तत्त्वाचे ज्ञान झाल्यानंतर आपण कांही कर्म केलेच नाही, करीत नाही व करणारही नाही असा अकर्त्या ब्रह्माशी एकरूपतेचा निर्धार झाल्यानंतर ब्रह्मसूत्राच्या प्रतिपादनानुसार (४:१:१३) झालेल्या वा होणाऱ्या कोणत्याच पापाचा लेशही त्याला स्पर्शत नाही. तसेच ब्रह्माच्या वस्तुसामर्थ्यामुळे औपनिषद सिद्धांताला (बृ.उ. ४:४:२२) आणि वेदांतसूत्रांना (४:१:१४) अनुसरून पुण्यही त्याला लागत नाही. ('नेदों लागों पापपुण्य अंगा'. संत तुकाराम). त्याच्या चित्तांतील सर्व गांठी मोकळ्या होतात आणि सर्व संशय फिटतात (मुंडक उ. २:२:८).

**प्रारब्धभोक्तात्मारामो जीवन्मुक्तो भवेद्ध्रुवम् । इत्युक्त्वोपररामेशः कार्तवीर्यस्तथाभजत् ।।५७।।**
**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तलीलाकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

प्रारब्ध+भोक्ता आत्म+आरामः ध्रुवं जीवन्+मुक्तः भवेत्। इति उक्त्वा ईशः उपरराम। कार्तवीर्यः तथा अभजत्।५७।

**'प्रारब्धभोक्ता'** या पदाने छांदोग्यांत सांगितल्याप्रमाणे (६:१४:२) ज्ञान झाल्यावर लगेच देह पडत नाही हे सूचित केले आहे. ब्रह्मसूत्रांत (४:१:१५) हेच प्रतिपादन आहे. अनारब्ध कर्मांचाच - म्हणजे संचिताचाच नाश होतो प्रारब्धाचा क्षय भोगूनच होतो. त्यामुळे शरीराचा पात होईपर्यंत प्रारब्धकर्म भोगावे लागतेच. भात्यांत असलेला बाण काढणे आणि त्याचे संधान करणे हे तीरंदाजाच्या मनावर असले तरी सोडलेला बाण कांही त्याला परत घेतां येत नाही. त्या बाणाचा वेग कमी झाल्यावरच तो जमिनीवर पडणार. तसेच ज्ञानी पुरुषाच्या प्रारब्धकर्माचे आहे. प्रारब्धानुसार आलेल्या भोगांना तो सादर होत असला तरी त्यांचे त्याला सुख वा दुःख कांहीच नसते हे स्पष्ट करण्यासाठी त्याला **आत्माराम** म्हटले आहे (मुंडक उ. ३:१:४). असा हा ज्ञानी निःसंशय (**ध्रुवं**) जिवंत असतांनाच मुक्त असतो (**'जीवन्मुक्तः'**) आणि देह पडल्यावर त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. देह हा कर्मफलाच्या भोगासाठीच उरलेला असल्याने त्याला ते भोगावेच लागतात; पण ज्ञानी पुरुषाला त्यांचे कांहीच सुख-दुःख नसते. ह्याचा उहापोह ब्रह्मसूत्रांत (४:१:१९) केलेला आहे. यापूर्वी पाहिल्याप्रमाणे प्रतिबंध नसला तर याच जन्मी ज्ञान होते (ब्र.सू. ३:४:५१) श्रुतीत (छां.उ. ८:४:१) आत्म्याला सेतू किंवा तीर म्हटले आहे, त्यावरून कुणी असा अर्थ काढतील की या ब्रह्माला पार करून आणखी कुठल्या तरी स्थानाला ज्ञानी जातो. तर ते तसे नाही. ब्रह्म कांही विशिष्ट बाबतीत सेतूसारखे आहे एवढाच त्याचा अर्थ आहे (ब्र.सू. ३:२:३१). बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:६) देहपातानंतर ज्ञानी पुरुषाच्या प्राणांचे उत्क्रमण होत नाही असे म्हटले आहे. ब्रह्मसूत्रातील निर्देशानुसार (४:२:१२) त्याचे प्राण देहांतच लय पावतात. तापलेल्या तव्यावर टाकलेल्या पाण्यासारखे ते ठायींच जिरून जातात. त्याच्या इंद्रियांचाही लय परमेश्वरांतच होतो. (ब्र.सू. ४:२:१५: प्रश्न उ. ६:५) ब्रह्मरंध्राचा भेद करून जाण्याचे वर्णन उपासकांच्या गतीचे आहे. त्यांना ब्रह्मदेवाबरोबर मुक्ति मिळते.

शुक्लगतीचीसुद्धां ज्ञान्यांना अपेक्षा नाही; कारण त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त दुसरे गन्तव्यच नाही. स्वर्गात जाणाऱ्या जीवांप्रमाणे त्यांना नवीन देह प्राप्त होत नाही. यासाठीच वर **ब्रह्मात्मा** असे म्हटले आहे. छांदोग्यांत (८:३:४) वर्णन केल्याप्रमाणे 'परम ज्योतिरूप प्राप्त करून तो त्या आपल्या मूळ रूपाने प्रकटतो'. ब्रह्मसूत्रानुसार (४:४:४) अपरोक्षानुभवाने प्राप्त होणारे मुक्त स्वरूप हे ब्रह्मापासून वेगळे नाही. म्हणजेच मुक्तीचा अर्थ आपलेच स्वयंसिद्ध आत्मस्वरूप आहे. स्वर्गादिकांप्रमाणे आगंतुक असे कांही नाही (ब्र.सू.३:४:५२). अशा या मुक्त पुरुषाला 'सर्वज्ञत्व, सत्यसंकल्पत्व इत्यादि गुणानी युक्त असा मी आहे' अशी जाणीवसुद्धां होत नाही; कारण ती होण्यासाठी कारणीभूत अविद्या मुळासकट नष्ट झालेली असते. म्हणूनच त्याला शून्यवृत्तिक म्हटले आहे. तो एकाच वेळी सविशेष आणि निर्विशेष ब्रह्माशी एकरूप झालेला असल्याने त्याला काळाचा भेद नाही (ब्र.सू. ४:४:५-७). अशा रीतीने दत्तप्रभूंनी उपदेशाचा समारोप केला आणि कार्तवीर्य अर्जुनाने त्यानुसार आचरण केले.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा चौथा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पंचमोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**पुराणोक्तावतारास्तु श्रुता यद्भवतोच्यते । तन्मे शुश्रूषवे व्यासाच्छंस त्वन्याश्च तत्कथाः ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**साधु पृष्टं त्वया वत्स शृणुष्वाऽवहितोऽमलाः । तत्कथा याः पुनन्त्यत्र श्रोतॄन्वक्तारमप्यघात् ।।२।।**

नामधारक उवाच। पुराण+उक्ताः अवताराः तु श्रुताः। यत् भवता उच्यते तत्, अन्याः च तत् कथाः, मे शुश्रूषवे शंस।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स, त्वया साधु पृष्टम्। अमलाः तत्+कथाः अवहितः शृणु, याः अत्र श्रोतॄन् वक्तारं अपि अघात् पुनन्ति।२।

**पंचमाध्यायी दत्तात्रेय ब्राह्मणीच्या भक्तीला। भुलून तियेचा श्रीपादनामा पुत्र झाला।।**
**हरुनि भावांचे अंधत्व तसे पंगुत्व निघाला। तीर्थटणा, लोकोद्धार करायला।।**

विवेक, वैराग्य, शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा आणि समाधान ही षट्संपत्ती आणि तीव्र मुमुक्षा ह्या चार साधनांनी संपन्न असलेला साधकाला गुरूंच्या उपदिष्ट महावाक्यांचे श्रवण, मनन, निदिध्यासन करून आत्मरूपाचा ऐक्यरूपाने साक्षात्कार होतो. परमार्थाला विमुख असलेल्यांना मात्र आपल्या अधिकारानुरूप कर्म, उपासना तसेच योग या साधनांनी प्रथम अंतःकरणाची शुद्धी आणि चित्ताची एकाग्रता संपादन करावी लागते. त्याने अर्थातच शमदमादि षट्संपदाही प्राप्त होतेच. विमुखांना कर्माचा उपदेश केला असला तरी गीतेत सांगितल्याप्रमाणे कर्माची गती गहन आहे. विहित कर्म, निषिद्ध कर्म (विकर्म) तसेच अकर्म (कर्म न करणे) हे सर्व नीट समजून घेतले पाहिजेत. ('कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं ह्यपि कर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहनो कर्मणा गतिः।।' भ.गीता ४:१७). हे कर्माचे तत्त्व ठाउक नसेल तर (विहित) कर्म करायला जावे तर तेच विकर्म होते आणि कधी कधी विकर्म केल्यानेच कर्म घडते. अशा प्रकारे विवेकाने भगवंताच्या प्रीतीसाठी म्हणून केलेल्या कर्मानेच सात्त्विक भक्ताला भगवंताचा कृपाप्रसाद लाभतो हे स्पष्ट करण्यासाठीच ह्या अध्यायाचा आरंभ केला आहे.

**धर्मं गोप्तुं सतस्त्रातुं दुष्टान्हन्तुं युगे युगे । लीलाधाम्नाऽवतरति नाऽन्यत्किञ्चित्प्रयोजनम् ।।३।।**
**दीनान्हीनमतीन्ज्ञात्वा दुर्बलान्नॄन्स कच्चरे । आविरासीत्समुद्धर्तुं प्रेम्णा भक्तिविधित्सया ।।४।।**

युगे युगे धर्मं गोप्तुं, सतः त्रातुं, दुष्टान् हन्तुं लीला+धाम्ना अवतरति। अन्यत् किञ्चित् प्रयोजनं न।३। कच्चरे नृन् दुर्बलान् दीनान् हीन+मतीन् ज्ञात्वा प्रेम्णा भक्ति+विधित्सया समुद्धर्तुं आविरासीत्।४।

पुराणांतरी वर्णन केलेले मत्स्य-कूर्मादि अवतार ऐकलेले आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या अंती आपण उल्लेखिलेले दोन अवतार ऐकण्यास मी उत्सुक आहे. तर ते अवतार व त्यांच्या इतर कथा विस्ताराने मला सांगाव्यात अशी प्रार्थना नामधारकाने केली आहे.१.

सिद्धमुनी म्हणाले, 'हे वत्सा तू हा प्रश्न फार चांगला विचारलास! त्या चित्ताचा मल घालवणाऱ्या आणि श्रोत्यांना तसेच वक्त्यालाही पापापासून शुद्ध करणाऱ्या त्या कथा आतां लक्ष देऊन ऐक.'२. आपल्या गीतेतील सुप्रसिद्ध प्रतिज्ञेनुसार (४:८) धर्माच्या रक्षणासाठी, साधूंच्या उद्धारासाठी आणि दुष्टांच्या निर्दलनासाठीच भगवंत लीलादेह धारण करून अवतरतात.

**परमेश्वर पक्षपाती आहे कां?** साधूंचा उद्धार करायचा आणि दुष्टांचा मात्र नाश करायचा याने परमेश्वरावर पक्षपात (**वैषम्य**) आणि दुष्टावा (**नैर्घृण्य**) यांचा आरोप करतां येत नाही. आई आपल्या बाळाचे कधी लाड करते तर आवश्यक तेव्हां त्याला मारतेसुद्धां. तसेच सर्वांच्या नियामक अशा परमेश्वराचेही आहे. लालन करतांना तसेच ताडन करतांनाही मातेच्या मनांत कारुण्यच असते तद्वतच जीवांना त्यांच्या पाप-पुण्यांचे फळ देण्यांत जीवांच्या अंतिम कल्याणाचेच विधान ईश्वर करत असतो. बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (३:२:१३) पुण्यवंत त्याने केलेल्या पुण्यकर्माने

**पीठापुरे पूर्वदेशे राजा नाम द्विजो वधूः । सुमतिस्तावुभौ नित्यं श्रीदत्तार्चनतत्परौ ।।५।।**

पूर्व+देशे पीठापुरे राजा नाम द्विजः, वधूः सुमतिः, तौ उभौ श्रीदत्त+अर्चन+तत्परौ।५।

होतो तर पापी त्याच्याच पापकर्मानि तसा होतो. भगवद्गीतेत श्रीकृष्ण म्हणतात, जो ज्या प्रकारे मला भजतो त्यानुसारच मी त्याला भजतो (४:११). 'वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् तथा हि दर्शयति।' (२:१:३४) या ब्रह्मसूत्राचा हाच अभिप्राय आहे. त्याचे अन्य कांहीही प्रयोजन नाही कारण भगवंत पूर्णकाम आहेत.३.

मलदूषित कलियुगांतील (**कच्चरे**) मानव दरिद्री, मंदबुद्धी आणि ब्रह्मचर्यादि साधनांचे बल नसलेले आहेत हे जाणून त्यांच्या उद्धारासाठीच परम वात्सल्याने आपल्या विद्या आणि शक्तीसहित, परिपूर्ण ज्ञान-बल-वीर्य धारण करून, परमात्मा शुद्धसत्त्वगुणसंपन्न चिन्मय देहाने भक्तिमार्गाच्या स्थापनेसाठी अवतरला.४.

पूर्वेकडील (आंघ्रांतील) पीठापूर नांवाच्या गांवी आपळराजा नांवाचा ब्राह्मण होता. त्याची पत्नी सुमती नांवासारखी उत्तम बुद्धी असलेली होती. दोघेही पतिपत्नी दत्तभक्त असून ते नित्य दत्तप्रभूंच्या पूजेत रमलेले असत.५.

**एकदैत्यास्य वेश्मार्थि-वेषेणान्नं स्म याचते । दत्तः श्राद्धेऽकृतेप्यस्मै श्राद्धाहेऽन्नं ददौ सती ।।६।।**
**तदा ज्ञात्वा स तद्भावं सर्वात्मा भगवान्विभुः । प्रीतः स्वरूपं साध्व्यै तत्करं धृत्वा व्यदर्शयत् ।।७।।**
**स्रक्कुण्डीडमरूच्छूल-शङ्खचक्रधरोऽब्रवीत् । व्याघ्रचर्मावृतस्त्र्यास्यो जटिलो भस्मभूषितः ।।८।।**
**मातर्द्विजेष्वभुक्तेषु श्राद्धाहेऽन्नं त्वयार्पितम् । हव्यकव्यादबुद्ध्या मे तत्तुष्टोस्मि वरं वद ।।९।।**

एकदा अस्य वेश्मे अर्थि+वेषेण एत्य दत्तः अन्नं याचते स्म। श्राद्ध+अहे श्राद्धे अकृते अपि सती अस्मै अन्नं ददौ।६। तदा सःसर्व+आत्मा भगवान् विभुः तत्+भावं ज्ञात्वा प्रीतः साध्व्यै तत्+करं धृत्वा स्वरूपं व्यदर्शयत्।७। स्रक्+कुण्डी+डमरु+उत्+शूल+शङ्ख+चक्र+धरः व्याघ्र+चर्म+आवृतः त्रि+आस्यः जटिलः भस्म+भूषितः अब्रवीत्।८। '(हे) मातः श्राद्ध+अहे द्विजेषु अभुक्तेषु त्वया हव्य+कव्य+ अद+बुद्ध्या मे श्राद्ध+अन्नं अर्पितम्। तत् तुष्टः अस्मि। वरं वद।'९।

एकदा त्यांच्या घरी ब्राह्मण याचकाच्या रूपाने येऊन दत्तप्रभूंनी अन्नाची याचना केली. त्या दिवशी घरी श्राद्ध होते आणि ब्राह्मण जेवायचे होते. तरीही अतिथीला विन्मुख पाठवूं नये असा विवेक करून सुमतीने भिक्षेकऱ्याच्या वेषांतील दत्तात्रेयांना अन्न दिले.६. तेव्हा सर्वांतर्यामी, सर्वव्यापी भगवंतांनी तिची ती भक्ती ओळखून अत्यंत प्रेमाने मातृभावाने त्या साध्वीचा हात धरून तिला आपल्या त्रैमूर्त्यात्मक रूपाचे दर्शन दिले.७. तीन मुखे आणि सहा हात असलेल्या प्रभूंनी खालच्या दोन हातांत माला-कमंडलु, मधल्या दोन हातांत डमरू-शूल आणि वरच्या दोन हातांत शंख-चक्र धारण केले होते. भस्माने भूषविलेल्या तनूवर व्याघ्रांबर लपेटले होते आणि मस्तकावर जटाभार रुळत होता. ते दत्तदेव त्या सतीला म्हणाले,(८) 'माई! श्राद्धाच्या दिवशी देवांच्या आणि पितरांच्या निमित्ताने निमंत्रित केलेल्या ब्राह्मणांचे भोजन होण्याआधीच हाच हव्य आणि कव्य यांचा भोक्ता विष्णू आहे (**हव्य+कव्य+अदः**) अशा बुद्धीने (भावाने) ते अन्न मला अर्पण केले त्याने मी संतुष्ट झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे! कितीही दुर्लभ मागणे असले तरी मी ते पुरवीन.'९.

**॥ ब्राह्मण्युवाच ॥**

**धन्यास्मि सर्वे पितरोऽपि धन्या यद्यो भवान्योगिमनोविदूरः ।**
**भूत्वाद्य मे दृग्विषयोऽपि पित्र्यं स्वाद्वाददेऽन्नं किमुताधिकं सत् ॥१०॥**
**सृष्ट्यादिहेतो जगतोऽसि भक्त-पुमर्थकल्पद्रुरतोऽर्पयाशु ।**
**मे सुप्रजस्त्वं जनसेवि मातरित्युक्तसम्बोधनसिद्धिपूर्वम् ॥११॥**
**एवं श्रुत्वात्रिवद्याच्ञां प्राह भूयात्तथैव ते । पुत्रस्ते भविता मादृक्तदुक्तिं मा तिरस्कुरु ॥१२॥**
**इत्युक्त्वाऽन्तर्दधे दत्तः सापि वेश्मैत्य हर्षिता । पत्ये शशंस तत्सर्वमुभावपि ननंदतुः ॥१३॥**

ब्राह्मणी उवाच। धन्या अस्मि। सर्वे पितराः अपि धन्याः यत् योगी+मनः+वि+दूरः भवान् मे दृक्+विषयः (अभूत्), (तथा) पित्र्यं स्वादु अन्नं अपि आददे। उत किं अधिक सत्?।१०। (हे) जगतः सृष्टि+आदि+हेतो! (हे) भक्त+पुं+अर्थ+कल्प+द्रुः जन+सेवि! 'मातः' इति उक्त+ संबोधन+सिद्धि+पूर्वं मे सु+प्रजस्त्वं आशु अर्पय।११। एवं अत्रिवत् याच्ञां श्रुत्वा प्राह, 'तथा एव ते मा+दृक् पुत्रः भविता। तत्+उक्तिं मा तिरस्कुरु'।१२। इति उक्त्वा दत्तः अन्तर्दधे। सा अपि हर्षिता वेश्मे एत्य तत् सर्वं पत्ये शशंस। उभौ अपि ननन्दतुः।१३।

त्या देवदुर्लभ दर्शनाने भारावून गेलेली ब्राह्मणी सद्गदित कंठाने बोलूं लागली. 'मी धन्य झाले! माझे सर्व पितर धन्य झाले!! योग्याच्या मनांपासूनही विशेषच दूर असणारे आपण आज माझ्या दृष्टीसमोर आलां. इतकेच नाही पितरांसाठी सिद्ध केलेले रुचकर अन्न ग्रहण केलेत! यापेक्षा अधिक सद्भाग्य ते काय?'१०. जगताची उत्पत्ती-स्थिती-संहार आपल्यापासूनच आहेत. भक्तांच्या पुरुषार्थासाठी आपण कल्पवृक्षाप्रमाणे आहांत. आपण 'आई' अशी जी हांक मारलीत तिला सत्यत्व येण्यासाठी (आपल्यासमान) सर्व लोकांना पूज्य अशा सुपुत्राचे मातृत्व मला शीघ्र द्या!११. अत्रिऋषींच्या मागण्यासारखीच ही तिची मागणी ऐकून दत्तप्रभू म्हणाले, 'तसेच होईल! तुला माझ्यासारखाच पुत्र होईल. मात्र त्याच्या वचनाचे तू कधीही उल्लंघन करूं नकोस!'१२. एवढे बोलून दत्तप्रभू अंतर्धान पावले. ती आनंदित झालेली सुमतीही घरांत आली आणि तिने यजमानांना सर्व हकीकत सांगितली. दोघेही हर्षनिर्भर झाले.१३.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**मयापराद्धमद्यान्नं दत्तं श्राद्धेऽकृतेप्यहो । दत्तात्रेयाय तन्नाथ क्षन्तुमर्हस्यशेषतः ॥१४॥**

॥ विप्र उवाच ॥

**पित्रर्थं भोजयित्वान्नैर्यैर्द्विजान्विष्णवेऽर्प्यते । कर्माभूत्स स्वयं तद्भुक्तत्कृतं सत्सुदुष्करम् ॥१५॥**
**रूपान्तरेण मध्याह्ने दत्तोऽटत्यर्थिवत्स्वकान् । उद्धर्तुं भगवांस्तस्मात्तदार्च्यो नान्यथाप्यते ॥१६॥**
**तस्माद्भद्रे कृतं भद्रं धन्ये नः पावितं कुलम् । वरोऽपि दुर्लभो लब्धो लोकस्यापि हितं यतः ॥१७॥**

ब्राह्मणि उवाच। 'अहो नाथ! अद्य श्राद्धे अकृते अपि दत्तात्रेयाय अन्नं दत्तम्। मया अपराद्धम्। तत् अशेषतः क्षन्तुं अर्हसि'।१४। विप्र उवाच। 'यैः अन्नैः पितृ+अर्थं द्विजान् भोजयित्वा (तत्) कर्म विष्णवे अर्प्यते, सः स्वयं तत्+भुक् अभूत्। सत्सु दुष्करं कृतम्।१५। दत्तः मध्याह्ने स्वकान् उद्धर्तुं रूपान्तरेण अर्थिवत् अटति। तस्मात् भगवान तदा अर्च्यः। अन्यथा (तथा) न आप्यते।१६। तस्मात् (हे) भद्रे, भद्रं कृतम्। नः कुलं पावितम्। वरः अपि दुर्लभः प्राप्तः। यतः लोकस्यापि हितम्'।१७।

सुमती म्हणाली, 'हे नाथ, श्राद्ध केलेले नसतांही श्राद्धीय अन्न दत्तात्रेयांना देऊन मी मोठाच अपराध केला आहे. आपण त्यासाठी क्षमा करावी!'१४. 'पितरांप्रीत्यर्थ केलेले जे चतुर्विध अन्न ब्राह्मणाना जेववून ते कर्म नंतर विष्णूलाच अर्पण करायचे असते. त्याच भगवान विष्णूंनी ते प्रत्यक्ष खाल्ले. हे अतिशय कठीण (किंवा मोठ्यांनाही कठीण) असे महान कर्म तू केलेले आहेस.१५. माध्याह्न काळी भगवान दत्तप्रभू याचकाच्या रूपाने भक्तांचा उद्धार करण्यासाठी फिरत असतात. त्या वेळी त्यांचे भिक्षा वाढून पूजन केले पाहिजे. अशा दुपारच्या वेळी केलेल्या अन्नदानाने त्यांची जशी कृपा प्राप्त होते तशी भजनपूजनादि अन्य साधनांनीही होत नाही. एवढ्यासाठी ही अन्नदानरूपी भगवत्सेवा अवश्यमेव करावी. माध्याह्नकाली आलेल्या अतिथीला अवश्य यथाशक्ती अन्न वाढावेच.१६. तेव्हां हे भाग्यवती, तूं हे पुण्याईचेच कार्य केले आहेस. आमचे कुल तू पावन केले आहेस. तसेच जो दुर्लभ वर तू मिळवला आहेस तो केवळ आपलेच नव्हे तर सर्व लोकांचेही हित करणारा आहे. तुझ्या निमित्ताने भगवान दत्तात्रेयांचाच अवतार भूतलावर होणार आहे!'१७.

**इत्युक्त्वा लौकिकं श्राद्धं शेषान्नेनाकरोद् द्विजः । साप्यथो गर्भिणी भूत्वा कालेऽसूतामुमप्यजम् ।।१८।।**
**मर्त्याकृतिं तदोद्वीक्ष्य तं दैवज्ञा जगुर्द्विज । ततपुण्यौघकल्पद्रु-फलं लब्धं सुदुर्लभम् ।।१९।।**
**अयं हि साक्षाद्भगवान्दत्तात्रेय इवार्चितः । अवतीर्णोऽत्र भक्त्यर्थमित्युक्त्वा ते मुदं ययुः ।।२०।।**

इति उक्त्वा द्विजः शेष+अन्नेन लौकिकं श्राद्धं अकरोत्। अथ सा अपि गर्भिणी भूत्वा काले, अजम् अपि अमुम्, असूत।१८। तदा मर्त्य+आकृतिं तं उद्वीक्ष्य दैवज्ञाः जगुः। (हे) द्विज, सुदुर्लभं ततः+पुण्य+ओघः+कल्प+द्रुः+फलं लब्धम्।१९। साक्षात् भगवान् दत्तात्रेय इव अर्चितः अयं (बालकः) हि अत्र (तव) भक्त्यर्थं अवतीर्णः (लक्ष्यते)। इति उक्त्वा ते मुदं ययुः।२०।

खरे तर श्राद्धासाठी केलेले अन्न साक्षात दत्तप्रभूंनाच समर्पण करून त्यांचीच प्रीती संपादन केल्यावर श्राद्ध सुसंपन्न झालेच होते. दत्तकृपेने ज्ञानी झालेल्या राजा आणि सुमती यांना हे कळतही होते. तरी पण ज्ञानी जसा आचरण करतो त्याचाच कित्ता इतर अज्ञानी लोक गिरवतात म्हणून गीतेच्या आदेशानुसार लोकसंग्रहासाठी त्या ब्राह्मणाने उरलेल्या अन्नाने ब्राह्मण जेववून श्राद्धाचा विधी पूर्ण केला. विष्णूला निवेदन केलेल्या अन्नाने अन्य देवतांची पूजा करूं नये असे स्मार्त मत असले तरी भागवत मताने आधी विष्णूला नैवेद्य दाखवून मगच अन्य देवतांना दाखवावे असाच विधी सांगितला आहे. पुढे त्या विप्रस्त्रीला गर्भ राहिला आणि यथाकाल दहाव्या महिन्यात जन्ममरणादि विकाररहित अशा ह्या वरद भगवंताला जन्म दिला.१८. मानवरूपधारी त्या प्रभूला पाहून - त्याचे जन्मकाळाचे ग्रहमान बघून, (आपळराजाने बोलावलेले) ज्योतिषी म्हणाले, 'विप्रवरा, खरोखर, तुझ्या पूर्वपुण्याईच्या वाढलेल्या कल्पवृक्षाचे अत्यंत दुर्लभ असे हे फळ तुला मिळाले आहे!१९. हा बाळ साक्षात् भगवान् दत्तात्रेयांसारखा पूज्य तुझ्या घरी तुझ्या भक्तीमुळेच अवतरला आहे असे आम्हाला वाटते.' असे बोलून बाळाच्या पत्रिकेतील शुभ आणि उच्चीचे ग्रह पाहून तेही आनंदित झाले.२०.

**श्रीपादः स्वङ्कितांङ्घ्रित्वान्नाम्नोक्तः पितृलौल्यतः । स्वङ्गैरृद्धिं पुपोषारं सौरांश्वाप्तेः शशीव सः ।।२१।।**
**संस्कृतेनोपनीतेन स्वयं त्रय्यपि पाठिता । स्वोद्वाहार्थं समुद्युक्तः पितानेन निवारितः ।।२२।।**

सु+अङ्कित+अङ्घ्रि+त्वात् श्रीपादः इति नाम्ना उक्तः। पितृ+लौल्यतः अरं सु+अङ्गैः सौर+अंशु+आप्तेः शशि इव ऋद्धिं पुपोष।२१।
संस्कृतेन (तथा) उपनीतेन अनेन स्वयं त्रयी पाठिता अपि। स्व+उद्वाह+अर्थं समुद्युक्तः पिता अनेन निवारिता।२२।

वज्र, अंकुश, ध्वज, पद्म इत्यादि शुभ चिह्नांनी शोभणाऱ्या पायांवरून त्याचे नांव श्रीपाद असे ठेवण्यांत आले. **श्री** या शब्दाचे शोभा, संपत्ती आणि पद्म असे अर्थ होतात. मातापित्यांच्या संगोपनाने लवकरच श्रीपाद सूर्यकिरणांनी व्यापलेल्या चंद्रासारखा सर्वांगांनी वाढू लागला. भारतीय परंपरेनुसार चंद्रमंडल हे जलमय आहे. त्या आकाशस्थ चंद्रावर पडलेले सूर्याचे किरण परावर्तित झाल्याने रात्रीचा अंधार नाहीसा होतो. एखाद्या अंधाऱ्या घरांत आरशावर पडलेल्या सूर्याच्या किरणांनी ते घर उजळून निघावे तसेच हे आहे. शुक्ल पक्षांत सूर्य आणि चंद्र यांच्यातील अंतर कमी होत जाते आणि सूर्याचे किरण वाढत्या प्रमाणांत चंद्रमंडलाला व्यापतात. त्यामुळे चंद्रबिंब जसे वाढत जाते तसा मातापित्यांच्या संगोपनाने श्रीपाद वाढूं लागला असा भावार्थ.२१. श्रीपादाचे जातकर्मापासून सर्व शास्त्रविहित संस्कार आपळराजाने केले आणि मुंजही केली. मुंज झाल्यावर खरे तर वेद आणि शास्त्रांचे अध्ययन करावयाचे असते. पण अवतारी श्रीपादाला त्या सर्वांचे स्वयंभूच ज्ञान असल्याने ऋक्, यजुः आणि साम या वेदत्रयीचे तसेच आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त या कर्मत्रयीचे त्यानेच इतरांना शिक्षण द्यायला आरंभ केला. यथाकाल श्रीपाद विवाहाला योग्य झालेला पाहून त्याच्या लग्नाच्या दृष्टीने राजा ब्राह्मणाने प्रयत्न आरंभिले. ते पाहून श्रीपादांनी मात्र त्यांना विरोध केला.२२.

**।। श्रीपाद उवाच ।।**

**मया प्रव्रजतोद्वाह्या योगश्रीरेव नापरा । ममैव सुलभा सा तु यतः श्रीवल्लभोऽस्म्यहम् ।।२३।।**
**इत्युक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वोभौ साश्रुलोचनौ । ऊचतुस्त्वयि याते क्व जीवावोऽब्जा इवाम्बुनि ।।२४।।**

श्रीपाद उवाच। 'प्रव्रजतः मया योग+श्रीः एव उद्वाह्या, न अपरा। मम एव सा सुलभा, यतः श्री+वल्लभः अस्मि'।२३। इति उक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वा स+अश्रु+लोचनौ उभौ ऊचुः। 'त्वयि याते क्व जीवावः? अम्बुनि (याते) अब्जा (मत्स्याः) इव (मरिष्यावः)।२४।

**गृहस्थाश्रमाची आवश्यकता -** आपळराजांनी केलेले प्रयत्न हे श्रुती आणि स्मृतींच्या आज्ञाना अनुसरूनच होते. मनुस्मृतींत (३:२) ब्रह्मचर्याश्रमांत एक वा दोन वेदांचे अध्ययन करून गृहस्थाश्रम स्वीकारावा असे सांगितले आहे. तैत्तिरीय उपनिषदांतही (१:११:१) वेदाध्ययन झाल्यावर, 'आचार्यांना धनाने - गुरुदक्षिणेने प्रसन्न करून प्रजेचा तंतू तोडूं नकोस' म्हणजेच विवाह करून पुत्रलाभासठी प्रयत्न करण्याचाच उपदेश केला आहे. याचे कारण जन्माला येणारा प्रत्येक ब्राह्मण देव, ऋषी आणि पितर अशा तीन ऋणांसहच येतो (तैत्तिरीय संहिता ६:३:१०). स्वाध्याय (वेदाध्ययन) करून, अनुरूप स्त्रीशी विवाह करून आणि यज्ञयागादींचे अनुष्ठान करून, ऋतुकाली पत्नीशी समागम करून ऋणत्रयांपासून मुक्त व्हावे. क्वचित् पुत्रोत्पत्तीला कांही प्रतिबंध येत असेल तर पुत्रकामेष्टी करून त्या दिशेने प्रयत्न करण्याचीही शास्त्राची आज्ञा आहे. निपुत्रिकाला (स्वर्गादि) लोक मिळत नाहीत असेही सांगितले असतांना श्रीपादवल्लभांनी त्यांना प्रतिबंध कां केला या प्रश्नाचे उत्तर पुढील श्लोकांत देत आहेत.

**श्रीपादांची भूमिका -** अध्यात्मयोगाला साह्यभूत होणाऱ्या श्रेयरूपा - कल्याणकारी लक्ष्मीचा मला अंगीकार करायचा आहे म्हणून मी संन्यास घेतो आहे. कर्ममयी दुसरी जी प्रेयरूपा संपत् तिच्या अंगीकारानेही अंतःकरणशुद्धीद्वारा दैवी संपत् मिळेलच असे म्हटले तर त्यांत कर्माच्या बंधनात अडकण्याचा धोका आहे.

**त्वं साक्षाद्भगवान्विष्णुः पुत्रत्वेनाप्यतीन्द्रियः । प्राक्पुण्यैर्गोचरीभूतः कुतोऽकाब्धौ जहासि नौ ॥२५॥**

'त्वं साक्षात् भगवान् विष्णुः अति+इन्द्रियः अपि प्राक्+पुण्यैः पुत्रत्वेन गोचरीभूतः। नौ अक+अब्धौ कुतो जहासि?'।२५।

कठोपनिषदाच्या उपदेशानुसार (१:२:१) श्रेयाच्या अंगीकाराने कल्याण होते तर प्रेयाच्या अंगीकाराने अधोगती होते. किंवा असाही अर्थ करतां येईल कीं वेदांनी चित्तशुद्धीसाठी सांगितलेली ऋग्वेदादिरूपा अपरा श्री मला स्वीकारायची नाही कारण ते साधन मला आधीच प्राप्त झालेले आहे. त्यामुळे माझ्यासारख्या अधिकारसंपन्नालाच लाभणाऱ्या 'श्रेयोरूपा संपत्ती'चाच मी स्वीकार करणार आहे. त्यामुळेच माझे 'श्रियेचा वल्लभ' असे नांव आहे. ह्याचा भावार्थ असा आहे की कर्मकाण्डांतील विधी आणि निषेध प्रतिपादणाऱ्या श्रुती संसारांत आसक्त असणाऱ्या लोकांना उद्देशून सांगितल्या आहेत; आसक्तिरहित साधकांना नव्हेत. लैंगिक सुख, मांसाशन आणि मदिराप्राशन यांच्याकडे स्वाभाविक ओढ असणाऱ्यांना विशिष्ट प्रसंगी, विशिष्ट प्रकारेच त्यांचे सेवन करण्याची शास्त्राची केवळ अनुज्ञा आहे. याला परिसंख्या असे म्हणतात. यज्ञांतला हुतशेष म्हणूनच थोडे मांस किंवा सुरा घ्यायला किंवा स्वतःच्या पत्नीशीच, ऋतुकाळांतच समागम करण्याचे (आश्वलायन श्रौतसूत्र २:१६,२२-२७) विधान आहे. पराशर स्मृतीत (४:१३) ऋतुकाळांत पत्नीजवळ न जाण्याने भ्रूणहत्येचा दोष लागतो असे सांगितले आहे. हा दोष नावडती म्हणून किंवा द्वेषामुळे भार्येची उपेक्षा करणाऱ्यांसाठी आहे, विरक्ताला नाही हे ध्यानांत घेतले पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) ह्याच परमात्म्याचे ज्ञान प्राप्त करण्याच्या इच्छेने पूर्वींच्या ऋषिमुनींनी संन्यास घेतला. संततीची इच्छा सोडली. ते म्हणतात, संतती घेऊन आम्हाला काय करायचे आहे? त्यांच्यापासून न आम्हांला हा आत्मा प्राप्त होईल न हा लोक! पुत्रैषणा, वित्तैषणा आणि लोकैषणा ह्यांचा त्याग करून ते भिक्षेकरी झाले.२३. असे बोलून घर सोडून निघालेल्या त्या श्रीपादवल्लभाला पाहून त्याच्या आईवडिलांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. ते म्हणाले, 'तू आम्हांला सोडून गेल्यावर आम्ही कसे जगूं? पाण्याविना मासोळ्यांसारखे आम्ही मरून जाऊं.' (२४) आपण साक्षात् भगवान विष्णु आहांत. अतीन्द्रिय असूनही आमच्या पूर्वपुण्याईमुळे पुत्र या नात्याने आम्हांला दर्शन दिलेत. आतां आम्हांला असे शोकसागरांत टाकून कसे जातां?'२५.

**पङ्ग्वन्धार्भेक्षणान्नित्यं भवपाशविमोचनी । स्मृतिः प्रवयसोर्नौ ते हरे दूरतरा भवेत् ॥२६॥**
**इति वाक्यं सकारुण्यं श्रुत्वारं भ्रातृमस्तके । सुखाकरं निजकरं तद्वात्सल्याद्दधौ हरिः ॥२७॥**
**तदैव सहसा तौ तु स्वङ्गौ ज्ञौ च बभूवतुः । लीलाविहारिणीदन्नो चित्रं भगवतीश्वरे ॥२८॥**

(हे) हरे, नित्यं पङ्गु+अन्ध+अर्भ+ईक्षणात् प्रवयसोः नौ ते भवपाशविमोचनी स्मृतिः दूरतरा भवेत्।२६। इति सकारुण्यं वाक्यं श्रुत्वा तत्+वात्सल्यात् हरिः सुख+आकरं निजकरं अरं भ्रातृमस्तके दधौ।२७। तदा एव तौ सहसा सु+अङ्गौ ज्ञौ च बभूवतुः। लीलाविहारिणि भगवति ईश्वरे इदं न चित्रम्।२८।

'दुःख, दैन्य, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या हरी, (तूं गेल्यावर) सतत एक आंधळा आणि एक पांगळा अशा ह्या मुलांकडे पहाणाऱ्या आम्हांला वृद्धापकाळी मृत्युरूप संसारपाशांतून सोडवणारी तुझी स्मृतीसुद्धां आम्हांला दुरावेल.' वार्धक्य आणि मृत्यू ह्या दोन्ही कठीण प्रसंगी आम्ही तुझ्यावांचून निराधार होऊं असा भावार्थ.२६. यापुढील श्लोक सिद्धमुनी सांगत आहेत.

असे त्यांचे दीनवाणे वचन ऐकून त्यांच्यावरील प्रेमाने दुःखहारक श्रीपादांनी सुखाची जणूं खाणच असा आपला आनंदप्रेषक हात लगेच आपल्या बंधूंच्या मस्तकावर ठेवला.२७. श्रीपादांच्या हाताचा स्पर्श होतांच तत्काळ त्या दोघां भावांचे अपंगत्व एकदम नाहीसे झाले. आंधळ्याला उत्तम दृष्टी आली आणि पांगळ्याला छान चालतां येऊं लागले. एवढेच नाही तर ते ज्ञानसंपन्न झाले. लीलेने मनुष्यदेह धारण केलेल्या सर्वसमर्थ ईश्वराच्या संबंधांत ह्यांत कांहीच आश्चर्य (**चित्रं**) नाही.२८.

**मातापयदृष्टपूर्वं तद्रूपमाश्चर्यवत्तदा । दृष्ट्वा दत्तोदितं स्मृत्वा प्राह गद्गदया गिरा ।।२९।।**
**माया दुरत्यया दैवी तव तन्मोहिता भृशम् । सत्वं रूपं न जानेऽतस्त्वयि मे पुत्रकल्पना ।।३०।।**

तदा माता अपि अदृष्टपूर्वं तत् रूपं आश्चर्यवत् दृष्ट्वा दत्त+उदितं स्मृत्वा (च) गद्गदया गिरा प्राह।२९। 'तव दैवी माया दुरत्यया। भृशं तत्+मोहिता (अहं तव) सत्त्वं रूपं न जाने। अतः त्वयि मे पुत्रकल्पना'।३०।

**आत्मदर्शन -** अशा रीतीने आपल्या वडील भावांना स्वस्थ केल्यावर श्रीपादांनी आपल्या आईला आपल्या स्वरूपाचे दर्शन दिले. ते पूर्वी न पाहिलेले स्वरूप पाहून ती स्तिमित झाली. खरे तर परमेश्वराची दोन स्वरूपे नाहीतच. पण हे सच्चिदानंदस्वरूप पूर्वी विक्षेप आणि आवरण ह्या मायेच्या दोन शक्तींच्या प्रभावाने, राहूने झांकलेल्या सूर्यासारखे, दिसले नव्हते - अनुभवाला आले नव्हते. ह्यांतून श्रीपादांनी आपल्या मातेला अपरोक्ष आत्मानुभूती दिली असे सूचित होते. गीतेत (२:२९) 'आश्चर्यवत् पश्यति' असेच आत्मदर्शनाचे वर्णन आहे. भ.पू. शंकराचार्यांनी हे आत्मदर्शन अदृष्टपूर्व असल्याने आश्चर्याला कारण होते असे टीकेत म्हटले आहे. त्याचाच इथे श्रीस्वामिमहाराजांनी अनुवाद केला आहे. कठोपनिषदातंही 'आश्चर्यो वक्ता' असे म्हटले आहे. सुमतीला आधी श्रीदत्तप्रभूंचे सगुण दर्शन झाले होते. हे त्यापेक्षां वेगळे निर्गुणसाक्षात्कारात्मक दर्शन झाले. ह्या अनुभवानंतर तिला त्या पूर्वीच्या दर्शनाच्या वेळी दत्तप्रभूंचे. 'तुला होणाऱ्या मुलाचे वचन मोडूं नकोस,' हे सांगणे आठवले आणि ती सद्गदित कंठाने म्हणाली.२९. 'तुझी अलौकिक अद्भुत माया खरीही म्हणतां येत नाही आणि खोटीही म्हणतां येत नाही ('सदसद्विलक्षण') अशी असल्याने दुस्तर आहे. त्यामुळे मी पार मोहून गेले! ('मुह्' या धातूचा अर्थ मनांत अवास्तव कल्पना उगवणे.) त्यामुळे तुझे वास्तव स्वरूप मला जाणतां आले नाही; आणि तू माझा मुलगा आहेस अशी विपरीत कल्पना माझ्या मनांत घर करून राहिली.'३०.

**ब्रह्माण्डलेखा यत्कुक्षौ स मत्कुक्षिज इत्यदः । जगद्विडम्बनं दत्त माया मां नावृणोतु ते ।।३१।।**

**।। श्रीपाद उवाच ।।**

**अदो रूपं त्वया दृष्टं नित्यं हृद्यवधारय । मायासिन्धुं द्रुतं तीर्त्वा मत्सायुज्यं गमिष्यसि ।।३२।।**
**शतायुषौ सुतौ तेऽपि पितृशुश्रूषणोत्सुकौ । विद्याश्रीपुत्रपौत्राढ्यौ मातर्मंक्षु भविष्यतः ।।३३।।**

यत् कुक्षौ ब्रह्मांडलेखा स मत्+कुक्षिजः इति अदः जगत् विडंबनं। (हे) दत्त! ते माया मां न आवृणोतु।३१। श्रीपाद उवाच। अदः त्वया दृष्टं रूपं नित्यं हृदि अवधारय। मायासिंधुं द्रुतं तीर्त्वा मत्+सायुज्यं गमिष्यसि।३२। (हे) मातः ते सुता अपि शतायुषौ, पितृशुश्रूषणोत्सुकौ, विद्या+श्री+पुत्र+पौत्र+आढ्यौ मंक्षु भविष्यतः।३३।

'ज्याच्या उदरांत अगणित ब्रह्मांडांच्या पंक्ती सहज सामावल्या आहेत तो माझ्या पोटीं जन्मला हे जगाला दाखवण्याचे केवळ नाटक आहे. हे दत्तप्रभो, तुझी माया माझ्या(बुद्धी)वर आवरण न टाको.'

**मायेची आवरणशक्ती -** मायेच्या दोन शक्ती आहेत. आवरणशक्ती आपल्या (आत्म)स्वरूपाला झांकून ठेवते, आणि विक्षेपशक्ती नसलेला, मिथ्या प्रपंच दाखविते. जन्ममरणादिरूप ह्या संसाराचे कारण मुख्यत्वे **असत्त्वावरण** आणि **अभानावरण** हेच आहेत असत्त्वावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्वच नाही अशी भावना. ही अध्यात्मशास्त्राच्या श्रवणमननाने दूर होते. अभानावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्व मनापासून पटले तरी तसा प्रत्यक्ष अनुभव न येणे. निदिध्यासनाने (ध्यानाने) हे जाऊन आत्मसाक्षात्कार होतो. विक्षेप म्हणजे देहादिकांच्या अध्यासाने खऱ्या वाटणाऱ्या जगतासंबंधीच्या कल्पना आणि विकार. हा विक्षेप संसाराचे कारण नाही. अंधुक प्रकाशांत दोरीवर भासणारा साप हे अज्ञान आहे. त्यांत दोरी न दिसणे हे अभानावरण आहे. ती दोरी तिथे नाहीच असे वाटणे हे असत्त्वावरण आहे.

**स्तुतोऽपि भ्रातरौ प्राह प्रव्रजाम्यधुना सदा । संसेव्यौ पितरौ तौ हि गृहिसत्पुत्रदैवतम् ।।३४।।**

**इत्युक्त्वा त्रिः परिक्रम्य प्रणम्य पितरौ स तु । जगाम तदनुज्ञातः काशीं च बदरीवनम् ।।३५।।**
**साधूनुद्धर्तुकामोऽथ गोकर्णं सज्जनाश्रयम् । ययौ यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम् ।।३६।।**

स्तुतःभ्रातरौ अपि प्राह, 'अधुना अहं प्रव्रजामि, पितरौ सदा संसेव्यौ। तौ हि गृहि+सत्+पुत्र+दैवतम्।'।३४। इति सः तु उक्त्वा पितरौ त्रिः परिक्रम्य तत्+अनुज्ञातः काशीं च बदरीवनं जगाम।३५। साधून् उद्धर्तु+कामः सत्+जन+आश्रयं गोकर्णं ययौ, यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्।३६।

**।।इति श्रीगुरुचरिते श्रीपादावतारो नाम पञ्चमोध्यायः।।५।।**

ह्या दोन्ही आवरणांमुळेच तिथे नसलेला साप दिसूं लागतो. तो पाहून निर्माण झालेले भय, शरीराला सुटलेला कांप इत्यादि विक्षेप होत. दिव्याच्या प्रकाशाने दोरी दिसणे हे ज्ञान होय. दोरी पाहिल्यावरसुद्धां छातीतली धडधड, शरीराचा कंप इत्यादि विक्षेप थोडा काळ राहतात. ते तसे राहिले तरी दोरीचे झालेले ज्ञान जात नाही आणि सापाचा भासही पुन्हा होत नाही. ते विक्षेप जावेत म्हणून वेगळे उपाय करण्याची आवश्यकता नाही. ते आपोआपच शमतात. ह्या अभिप्रायानेच सुमती फक्त मायेच्या आवरणापासूनच दूर ठेवण्याची प्रार्थना करीत आहे. श्रीस्वामिमहाराजांच्या 'सत्यज्ञानानंत' या अभंगांत हा अभिप्राय फार छान मांडलेला आहे. तो इथे उद्धृत करीत आहे.

**सत्यज्ञानानंत तुज वदे वेदांत । हें शोधितों होउनी दांत शांत समाहित ।।१।।**

**मालासर्पभ्रांत ध्वांती दीपें शांत । होय तेवीं हा वेदांत शमवी जीवभ्रांत ।।२।।**

**साप नोहे माळा स्पष्ट दिसली डोळां । घातली कंपे मिठी गळां न सुटे कांही वेळां ।।३।।**

**आवरणाची स्थिती न वसे विज्ञानांती । विक्षेपाची स्वरूपशांती होय प्रारब्धांतीं ।।४।।**

**जीव त्वन्मय होतां आवरणाची न वार्ता । स्वाधिष्ठानी तत्त्वें मिळतां विक्षेपान्त दत्ता ।।५।।**

**ऐसा वेदांतार्थ जाणुनी शोधूं स्वार्थ । मग तूं दत्ता भेटसी आम्हां इतर श्रम हा व्यर्थ ।।६।।**३१.

हे तूं पाहिलेले रूप सतत हृदयांत धारण कर म्हणजे तू हा मायासागर लवकरच पार करून माझे सायुज्य प्राप्त करशील. ह्या तुला अनुभवाला आलेल्या आत्मस्वरूपाचे तूं नित्य मनन आणि निदिध्यासन करून तें सत्त्वप्रधान हृदयांत स्थिर कर असा आदेश श्रीपादांनी दिला आहे. **दृष्टं** म्हणजे वृत्तिव्याप्तीने अनुभवलेले आत्मस्वरूप. वृत्तीव्याप्ती आणि फलव्याप्ती अशा दोन प्रकारांच्या ज्ञानांचा विचार आपण चौथ्या अध्यायांत (४:५५) केला आहे. आत्मानुभूती झाली तरी ती चित्तांत स्थिर होण्यासाठी अभ्यासाची आणि काळाची आवश्यकता आहे. एकदां केलेल्या उपदेशाने ज्ञान स्थिर झाले नाही तर त्याची उजळणी करावी ह्या ब्रह्मसूत्राचा (४:१:१) दाखला इथे श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. अशा रीतीने ज्ञानाचे प्रतिबंध (असंभावना, संशयभावना आणि विपरीतभावना) दूर होऊन माझ्या सच्चिदानंद स्वरूपाशी तूं एकरूप होशील.३२. तसेच हे माते, तुझे हे दोन्ही पुत्र शतायुषी होतील, आई-वडिलांची (तुमची) सेवा करण्यांत तत्पर असतील आणि विद्या, संपत्ती, पुत्र, पौत्र इत्यादीनी समृद्ध होतील.३३.

**दैवतें मायबाप -** श्रीपादांनी मातेला उपदेश केल्यावर त्यांच्या ज्येष्ठ बंधूंनीही त्यांचे स्तवन केले. त्यांना श्रीपाद म्हणाले, ‘आज मी घर सोडून संन्यस्त जीवनाचा अंगीकार करीत आहे. तुम्ही दोघांनी यापुढे आईवडिलांची निरलस सेवा करावी. कारण गृहस्थाश्रमांत गुणी सुपूताची मुख्य दैवते मातापिताच आहेत. तशी वेदांची ‘मातृदेवो भव. पितृदेवो भव’ आज्ञाच आहे.’ यांत मुख्यतः गृहस्थाश्रमाचाच उल्लेख एवढ्यासाठी आहे की ब्रह्मचारी गुरूंच्या अधीन असतो आणि संन्याशाने सर्व ममत्वाचा त्याग केलेला असतो.३४. वर **‘पितरौ’** या शब्दाने आई आणि वडील असा दोघांचाही बोध होतो. आईवडिलांना तीन वेळां सव्य प्रदक्षिणा करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन श्रीपाद काशी आणि बदरिकाश्रमाला जायला निघाले.३५. काशी आणि बदरी यांची यात्रा करून श्रीपाद साधूंच्या उद्धाराच्या इच्छेने, सज्जनांना आश्रयभूत

अशा गोकर्णाला गेले, जिथे साक्षात् गणेशाने शैव लिंगाची स्थापना केली आहे.३६.

**समारोप -** श्राद्धाचा स्वयंपाक श्राद्धाच्या पूर्वीच इतरांना देणे हे तसे विकर्मच मानावे लागेल. पण भुकेला अतिथी घरी आलेला असेल तर त्याला अन्न नाही दिले तरीही ते विकर्मच होईल. *'स इद्भोजो यः'* इत्यादि मंत्रातून (ऋग्वेद १०:११७:३-४) अन्नदानाचे महत्त्व वर्णन केले आहे. अशा दुविधेत सांपडलेल्या सुमतीने दान न देण्यापेक्षां दान देणे बरें अशा भावात्मक निर्णय घेतला आणि *'अतिथिः सर्वरक्षकः'* या वचनाला अनुसरून हा अतिथी विष्णुस्वरूप आहे अशा ईश्वरबुद्धीने अतिथीला अन्न दिल्याने त्या सत्त्वगुणसंपन्न ब्राह्मणीला श्राद्धाच्या अनंतपट फळ लाभले. यावरून असे दिसते की सत्कर्माला प्रवृत्त होणारा बंधातून मुक्त होतो. अन्यथा कर्माची गती गहन आहे हेच खरे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा पांचवा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## अथ षष्ठोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**शैवं तत्र गणेशेन कुतो लिङ्गं प्रतिष्ठितम् । सज्जनाश्रयमेतत्तु कथं श्रावय मे मुने ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**विष्णवाज्ञया गणेशेन रावणात्तं प्रतिष्ठितम् । शैवं लिङ्गं ततोऽत्रासन्देवाः संतोऽप्यदः शृणु ।।२।।**

नामधारक उवाच। तत्र गणेशेन शैवं लिङ्गं कुतः प्रतिष्ठितम्? एतत् तु सत्+जन+आश्रयं कथम्? (हे) मुने, मे श्रावय।१। सिद्ध उवाच। गणेशेन विष्णु+आज्ञया रावण+आत्तं शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्। ततः देवाः संताः अपि अत्र आसन्।२।

**रावणाला फसवून गणेशें केले लिंग स्थापन ।**
**सहाव्यांत चांडालीचा उद्धार आणि गोकर्णवर्णन ।।१।।**

कर्माचे तत्त्व जाणणाऱ्या सात्त्विक भक्तावर ईश्वराचा प्रसाद होतो हे पांचव्या अध्यायांत दाखविल्यावर कर्मतत्त्व न जाणणाऱ्या असात्त्विक (आसुरी) भक्तावर देवाची कृपा झाली तरीही ती विघ्नांच्या द्वारा कशी निष्फळ होते ते ह्या अध्यायांत सांगितले आहे.

मागील अध्यायाच्या शेवटी आपण त्या गोकर्ण क्षेत्रांत गणेशाने शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली असे म्हणालांत ते कसे काय? तसेच हे गोकर्ण साधु जनांचा आश्रय आहे ते कोणत्या प्रकारे?१. सिद्धांनी उत्तर दिले - भगवान विष्णूंच्या आज्ञेने रावणाकडून घेतलेल्या भगवान शंकरांच्या आत्मलिंगाची गणपतीने ह्या क्षेत्रांत प्रतिष्ठापना केली. तेव्हांपासून ब्रह्मदेवादि देव तसेच साधूसंत इथे राहू लागले.२.

**भजन्तीं मृन्मयं लिङ्गं कैलासाप्त्यै तु रावणः । प्रसूं निषिध्य सेशाद्रिं श्रीमानाहर्तुमाययौ ।।३।।**

**हठात्कैलासमुद्धर्तुमुत्कमोजस्विनं शिवः । लोकोत्पातभिया गौर्या स्तुतोऽगाधोऽवरोधयत् ।।४।।**

**सोऽपि मृत्यून्मुखीभूतो ध्यानतुष्टेन शम्भुना । समुद्धृतो दशमुखस्तत्तुष्ट्यै साध्वगायत ।।५।।**

कैलास+आप्त्यै मृत्+मयं लिङ्गं भजन्तीं प्रसूं निषिध्य श्रीमान् स+ईश+अद्रिं आहर्तुं आययौ।३। हठात् कैलासं उद्धर्तुं उत्कं ओजस्विनं लोक+अत्पात+भिया गौर्या शिवः स्तुतः अग+अधः अवरोधयत्।४। सः अपि मृत्यु+उन्मुखी+भूतः ध्यान+तुष्टेन शम्भुना समुद्धृतः। दश+मुखः तत्+तुष्ट्यै साधु अगायत्।५।

एकदा रावणाची आई मृत्तिकेचे लिंग करून त्याची शंकराप्रमाणे पूजा करत असलेली रावणाला दिसली. आपल्यासारखा ऐश्वर्यसंपन्न मुलगा असतांना आईने यःकश्चित् मातीच्या लिंगाची पूजा करावी हे त्याला सहन झाले नाही. तिला तसे न करण्याला सांगून तिच्यासाठी साक्षात् कैलास पर्वतच भगवान शंकरासह आणण्याच्या उद्देशाने तो तिथे गेला.३. कैलासाजवळ पोंचतांच महाबली रावणाने आपल्या आसुरी वृत्तीला अनुसरून अख्खा पर्वतच पायापासून उचलायला आरंभ केला. त्यामुळे कैलासावर भूकंपासारखे उत्पात होऊं लागले. तेथील सर्व लोक घाबरून शंकरांकडे आले. तेव्हां पार्वतीने ध्यानमग्न शंकरांची स्तुती केली आणि कैलासावर आलेले हे संकट निवारण्याची प्रार्थना केली. तेव्हां शंकरांनी तो पर्वत डाव्या हातानेंच दाबून धरला. त्या वेळी रावण त्याच्या खाली सांपडला.४. शंकरांनी डाव्या हाताने सहज दाबल्यानेसुद्धां तो दहा तोंडांचा रावण मरणोन्मुख झाला आणि ध्यान करून शंकरांकडे दयेची याचना करूं लागला. तेव्हां प्रसन्न झालेल्या सदाशिवांनी त्याला कैलासाखालून सुखरूप बाहेर काढले. मग तो रावण शंकरांना प्रसन्न करण्यासाठी सुमधुर गाऊं लागला.५.

**सुस्वरं साङ्गरागाढ्यं माधुर्यं स्वर्णमुत्तमम् । कालोचितं जगौ गीतं ततानद्धघनारयुक् ।।६।।**
**प्राणिमात्रमनोहारि दिव्यं गानं स शंकरः । प्रीतोऽब्रवीत्साधु गीतं रावणेष्टं वरं वृणु ।।७।।**

**।। रावण उवाच ।।**

**पूर्मेऽन्यदुर्लभा हैमी श्रीर्दासी दैवविद्विधिः । मृत्युर्दासोऽनुगा देवास्तन्मे न क्वापि दुर्लभम् ।।८।।**

सु+स्वरं स+अङ्ग+राग+आढ्यं माधुर्यं स्वर्णं उत्तमं काल+उचितं तत+आनद्ध+घन+आर+युक् गीतं जगौ।६। सः शंकरः प्रीतः अब्रवीत्। (हे) रावण प्राणि+मात्र+मनः+हारि दिव्यं गानं साधु गीतम्। इष्टं वरं वृणु।७। रावण उवाच। मे हैमी पूः अन्य+दुर्लभा, श्रीः मे दासी, विधिः दैव+वित्, मृत्युः दासः, देवाः अनुगाः। तत् मे क्व अपि दुर्लभं न।८।

बळाच्या जोरावर कैलास मिळणे शक्य नाही हे कळतांच रावणाने भगवान शंकरांची गानप्रियता लक्षांत घेऊन आपल्या संगीताने त्यांना प्रसन्न करण्याचा उद्यम आरंभिला. सप्तस्वरांच्या सुरेल रचनेने विविध रागरागिणींनी युक्त गोड गायन तो करूं लागला. तो उत्तम कवी असल्याने त्याने यमक-अनुप्रासादि शब्दालंकारांनी आणि अर्थालंकारांनी युक्त अशी गीते रचून तो गाऊं लागला. आपली दहा मुखे आणि वीस हात यांचा उपयोग करून त्याने वीणादि तंतुवाद्ये (‘तत’), पखवाजादी चर्मवाद्ये (‘आनद्ध’), झांजा, टाळ इत्यादि घन वाद्ये आणि बांसरी, सनई इत्यादि फुंकून वाजवायची (‘आर’) वाद्ये अशी चारही प्रकारची वाद्ये साथीला घेतली. आपल्या आंतडीचे तंतुवाद्य करून त्याने वाजविले असा इतरत्र उल्लेख आहे.६. मानव आणि देवच नव्हे तर सर्वच प्राण्यांच्या मनाला लुभवणारे ते गायन ऐकून ते आशुतोष शंकर भगवान प्रसन्न होऊऩ त्याला प्रेमाने म्हणाले, रावणा! हे तुझे अलौकिक गायन उत्तम झाले. तुला हवा तो वर मागून घे.७. रावण शंकरांना वर मागतांना आधी प्रौढी करतो आहे. ‘माझी सोन्याची लंका शत्रूला अभेद्य आहे, साक्षात् लक्ष्मी माझी दासी आहे, ब्रह्मदेव माझा ज्योतिषी आहे, मृत्यू माझ्या आज्ञेवांचून कुणाचे प्राण घेऊं शकत नाही, सगळे देव माझे अनुचर आहेत. तेव्हां मला दुर्लभ असे या त्रैलोक्यांत काय आहे?’८.

**मात्राज्ञप्तोऽस्मि कैलासमानेतुं भो त्वयान्वितम् । देहि मे वरणीयार्थं भगवन्वरदोऽसि चेत् ।।९।।**

**।। शिव उवाच ।।**

**कैलासेन तु किं साध्यं प्राणलिङ्गं ततोऽधिकम् । गृहाणानेन मादृक्त्वं पूस्ते कैलासवद्भवेत् ।।१०।।**
**स्थाप्यते यत्र तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति । तस्मात्स्थापय पुर्येव धृत्वेदं कर्म मा कुरु ।।११।।**
**इत्युक्त्वा तत्करे लिङ्गं भक्त्याकृष्टमना ददौ । रावणोऽप्यतिसन्तुष्टो ययौ लङ्कां खलाग्रणीः ।।१२।।**

भो! मात्रा त्वया अन्वितं कैलासं आनेतुं आज्ञप्तः अस्मि। भगवन् वरदः असि चेत् वरणीय+अर्थं मे देहि।९। शिव उवाच। कैलासेन तु किं साध्यम्? ततः अधिकं प्राण+लिङ्गं गृहाण। अनेन त्वं मादृक्, ते पूः कैलासवत् भवेत्।१०। इदं यत्र स्थाप्यते तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति। तस्मात् पुरि एव स्थापय। इदं धृत्वा कर्म मा कुरु।११। भक्त्या+आकृष्ट+मना (शिवः) इति उक्त्वा तत्+करे लिंगं ददौ। खलाग्रणीः रावणः अपि अतिसंतुष्टः लङ्कां ययौ।१२।

आपल्याला स्वतःसाठी कांहीच मागायचे नाही अशी प्रस्तावना करीत रावण आपल्या आईचे नांव पुढे करीत आहे. मला मातेने आपल्यासहित कैलास आणण्याची आज्ञा केली आहे. आपल्याला वर द्यायचाच असला तर हाच वर (आपल्यासहित कैलास) द्या.९. तेव्हां भगवान शंकर त्याला म्हणाले, कैलास घेऊन काय मिळणार? त्यापेक्षां हे माझे प्राणलिंगच घे! त्याच्यामुळे तूं माझ्यासारखा होशील आणि तुझी लंकानगरीच कैलास होईल.१०. हे माझे आत्मलिंग तूं ज्या ठिकाणी ठेवशील तिथेच कायम स्थिर होईल. यासाठी तू ते आपल्या नगरीत पोचल्यावरच खाली ठेव. तसेच हे हातांत धरून कोणतेही कर्म करूं नकोस.११. भक्तीला भुललेल्या शंकरांनी असे बोलून ते आपले प्राणलिंग त्या रावणाच्या हातांत ठेवले. रावण म्हणजे लोकांना आक्रोश करायला लावणारा ('लोकान् रावयति') म्हणून त्याला दुष्टशिरोमणी म्हटले आहे. ते लिंग हातांत पडतांच त्याचा हर्ष गगनांत मावेना. त्याने तडक लंकेची वाट घरली.१२.

**ज्ञात्वैतन्नारदो योगी शशंस ब्रह्मणेऽपि सः । विष्णवे द्राक् त्रयोऽपीशं गत्वोचुः किं कृतं त्विदम् ।।१३।।**
**बद्धाः सर्वेऽमरा येन प्रसिद्धो लोककंटकः । राक्षसः प्राणिमात्राशी त्वत्समः स कथं कृतः ।।१४।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्याकृष्टं मनो मेऽद्य तेन गानादिना ततः । दत्तं लिङ्गं मया हर्षात्स नाद्यापि पुरं गतः ।।१५।।**
**व्याजेनैव खलो जय्य इत्युक्त्वा प्रेरयन्मुनिम् । विघ्नेशं च तदा विष्णुर्लिङ्गाहरण हेतवे ।।१६।।**

योगी नारदः एतत् ज्ञात्वा ब्रह्मणे शशंस। सः अपि विष्णवे (शशंस)। त्रयः अपि ईशं गत्वा ऊचुः इदं तु किं कृतम्?१३। येन सर्वे अमराः बद्धाः सः प्रसिद्धः लोककंटकः प्रणिमात्र+आशी राक्षसः त्वत्+समः कथं कृतः?१४। शिव उवाच। तेन गानादिना भक्त्या मे मनो अद्य आकृष्टम्। ततः मया हर्षात् लिंगं दत्तम्। (किंतु) सः अद्यापि पुरं न गतः।१५। तदा विष्णुः खलः व्याजेनैव जय्यः इति उक्त्वा मुनिं विघ्नेशं च लिंग+आहरण+हेतवे प्रेरयत्।१६।

योगाच्या परिपक्वतेने त्रिकालज्ञानी नारदांनी हे जाणले आणि मनोगतीने ही सर्व लिंगदानाची हकीकत जाणली. मनोवेगाने ब्रह्मलोकाला जाऊन आपल्या पिताजींच्या कानी घातली. ब्रह्मदेवसुद्धां नारदांना घेऊन तांतडीने वैकुंठाला गेले आणि त्यांनी विष्णूंना सर्व प्रकार कथन केला. मग ते तिघेही केवळ संकल्पानेच कैलास पर्वतावर शंकरांसमोर उपस्थित झाले आणि म्हणाले, रावणासारख्या दुष्टाला आत्मलिंगाचे दान आपण कसे बरे केले?१३. ज्याने सर्व देवांना बंदीखान्यांत टाकले आहे, जो तिन्ही लोकांना उपद्रव देणारा कांटा आहे असा सर्व प्राण्यांची संपत्ती आणि देहसुद्धां खातो असा राक्षस तुम्ही आपल्यासारखा कसा केला?१४. शंकर म्हणाले, 'त्याने गायनादि भक्तीने माझ्या मनाला भुरळ घातली. त्या आनंदांत मी त्याला आत्मलिंग दिले खरे! पण अजून तो लंकेला पोंचला नाही.' यांतून शंकर असे सुचवीत आहेत की तो लंकेला पोंचण्यापूर्वी माझ्या वरदानाला बाध न आणतां कांही उपाय तुम्ही करूं शकतां.१५. त्या वेळी विष्णूंनी विचार केला कीं ह्या दुष्टाला जिंकण्यासाठी साम-दाम-दंडादींचा उपयोग नाही. त्याला कपटानेच जिंकतां येईल. असे म्हणून त्यांनी नारदमुनीना रावणाला उशीर करायला, आणि विघ्नराज गणपतीला विघ्न करायला आणि रावणाकडून लिंग काढून घेण्यासाठी पाठविले.१६.

**नारदस्त्वञ्जसा योगी गत्वाग्रे रक्षसोऽब्रवीत् । आयातोऽसि कुतो ब्रूहि रावण द्राक् क्व गच्छसि ।।१७।।**
**रावणस्त्वब्रवीद् ब्रह्मन् तोषयित्वाद्य शंकरम् । लब्ध्वा लिङ्गं पुरं यास्ये पश्येदं शैवमुत्तमम् ।।१८।।**
**तत्प्रेक्ष्योचे मुनी रक्षः शृण्वेकः सैरभाशनः । मृगयायां हतो ब्रह्महरीशैर्दुर्धरो मृगः ।।१९।।**
**तैस्त्रीण्याप्तानि लिङ्गानि तच्छृङ्गेभ्यस्तदात्मवत् । मतान्यैशं त्विदं दैवाल्लब्धं सायुज्यदं विभोः ।।२०।।**
**सोऽप्याह नाद्य श्रोतव्यं गन्तव्यं सत्वरं मुने । क्वातीत्य संध्यां यासीति मुनिनोक्त उपाविशत् ।।२१।।**

योगी नारदः तु अञ्जसा रक्षसः अग्रे गत्वा अब्रवीत्। (हे) रावण कुतः आयातः असि? तथा द्राक् क्व गच्छसि? (मे) ब्रूहि।१७। रावणः तु अब्रवीत्। (हे) ब्रह्मन्! अद्य शंकरं तोषयित्वा लिंगं लब्ध्वा पुरं यास्ये। इदं उत्तमं शैवं (लिंगं) पश्य।१८। तत् (लिंगं) प्रेक्ष्य मुनी ऊचे। (हे) रक्षः शृणु। ब्रह्म+हरि+ईशैः मृगयायां एकः सैरभ+अशनः दुर्धरः मृगः हतः।१९। तैः तत्+शंगेभ्यः त्रीणि लिङ्गानि आप्तानि। (तानि तैः) आत्मवत् मतानि। इदं तु ऐशं विभोः सायुज्यदं दैवात् लब्धम्।२०। सः अपि आह, 'मुने न अद्य श्रोतव्यं, सत्वरं गन्तव्यम्।' ' संध्यां अतीत्य क्व यासि?' इति मुनिना उक्तः (सः) उपाविशत्।२१।

प्रथम नारदमुनी योगगतीने तात्काळ त्या राक्षसापुढे गेले आणि त्याला म्हणाले, 'अरे रावणा! तूं कुठून येतोयस? आणि एवढ्या घाईने कुठे चाललास? मला जरा सांग!'१७. रावण उत्तरला, 'मुनिवर्य! आज मी भगवान शंकरांना प्रसन्न करून त्यांचे आत्मलिंग मिळविले आहे. ते घेऊन मी माझ्या नगरीला जातो आहे. हे अत्युत्कृष्ट शैव लिंग पहा.'१८. ते लिंग पाहून नारदमुनी त्याला म्हणाले, 'हे राक्षसराजा, ह्याचा इतिहास ऐक. ब्रह्मा, विष्णू आणि शंकर ह्या तिघांनी शिकारीत एक रानरेड्यांचा आहार करणाऱ्या एक दुर्धर हिंस्र पशूची शिकार केली.१९. त्यानी त्या पशूच्या शिंगांपासून तीन लिंगे घेतली. ती आपल्यासमान मानून धारण केली. हे तर भगवान शंकरांचे लिंग आहे. हे तुला शिवसायुज्य प्राप्त करून देईल. तुला मोठ्या सद्भाग्याने हे मिळाले आहे.२०. तो (रावण) परत म्हणाला, 'मुनिराज, मला लवकर गेले पाहिजे. तुमची कथा ऐकायला मला आतां वेळ नाही.' 'अरे, संध्येची वेळ झाली आहे. संध्या सोडून कुठे चाललास?' असे नारदांनी त्याला टोंकल्यावर तो संध्येला बसला.२१.

**अत्रान्तरे गणेशोऽपि वर्णिलिङ्ग्याययौ स तम् । करे कृत्वाऽब्रवीत्कोऽसि कस्य पुत्रः क्व गच्छसि ।।२२।।**
**सोऽप्याहोमाशंकरौ मे पितरौ देयमस्ति ते । किं ताभ्यां भो न चेत्पाणिं मोचयाशु बिभेम्यहम् ।।२३।।**
**रावणोऽप्याह नादेयं ताभ्यां लिङ्गं क्षणं वह । हैमीं मे गौरवाल्लङ्कां दर्शयामि सुखं वस ।।२४।।**
**बालेनैवोरु लिङ्गं नो धार्यतेऽपि न गम्यते । लङ्का घोरेत्यपि प्रोक्तः स तमाश्वास्य तद्ददौ ।।२५।।**
**दत्तलिङ्गोऽब्धितीरे स सांध्यां कर्तुं क्रियां ययौ । बालोऽप्याह त्रिराहूय नागते स्थापयामि कौ ।।२६।।**

अत्रान्तरे वर्णि+लिङ्गी गणेशः अपि आययौ। सः तं करे कृत्वा अब्रवीत्। 'कः असि?', 'कस्य पुत्रः?', 'क्व गच्छसि?'२२। सः अपि आह। 'उमा-शंकरौ मे पितरौ। ताभ्यां ते देयं अस्ति किम्? न चेत्, भोः आशु पाणिं मोचय। अहं बिभेमि।'२३। रावणः अपि आह, 'ताभ्यां न आदेयम्। क्षणं लिङ्गं वह। (ततः तुभ्यं) गौरवात् मे हैमीं लंकां दर्शयामि। (तत्र त्वं) सुखं वस।२४। 'बालेन एव(मया) ऊरु लिंगं नो धार्यते। घोरा लंका अपि न गम्यते। इति प्रोक्तः सः (रावणः) तम् आश्वास्य तत् (लिंगं) ददौ।२५। दत्तलिंगः सः सांध्यां क्रियां कर्तुं अब्धितीरे ययौ। बालः अपि आह, '(त्वां) त्रिः आहूय (त्वया) नागते लिंगं कौ (भुवि) स्थापयामि'।२६।

इतक्यांत ब्रह्मचारी वेषाने गणेशही तेथे आले. त्याने (रावणाने) त्याला प्रेमाने हाताला धरून विचारले, बाळा, तूं कोण? कुणाचा पुत्र आहेस? कुठे चाललास?२२. मुंज्याच्या वेषांतील गणपतीही त्याला म्हणाला, 'उमा माझी माता आहे आणि शंकर माझे पिता. ते तुझे कांही देणे लागतात कां? नसेल तर हे राक्षसा, लवकर माझा हात सोड. मला तुझी भीती वाटते!'२३. असे बोलणाऱ्या त्याला रावण त्याला म्हणाला, 'नाही रे! तुझ्या आईवडिलांकडून माझें कांही येणे नाही. हे माझे लिंग थोडा वेळ धर. तुला माझी सोन्याची लंका दाखवीन. तूं तिथे सुखाने राहा.'२४. 'मला पोराला हे जड लिंग धरवणार नाही; (तुझी) लंका भीषण वाटते' असे कुरकुरणाऱ्या गणेशाला कसेबसे समजावून ते लिंग (बळेच) त्याच्या हातांत दिले.२५. अशा रीतीने लिंग गणेशाच्या हातीं ठेवून तो रावण संध्याकर्म करण्यासाठी समुद्रकिनारी गेला. बालगणेशाने त्याला बजावले, 'तुम्हांला तीन वेळां हांका मारून तुम्ही आला नाही तर हे भारी लिंग मी जमिनीवर ठेवीन.'२६.

**इत्युक्त्वा किञ्चिद्विश्रम्य स्वः पश्यत्सु सुरेषु तम् । त्रिराहूय हरिं स्मृत्वा लिङ्गं सोऽस्थापयद्भुवि ।।२७।।**
**सोऽपेत्य स्थापितं दृष्ट्वा सन्ताड्यार्भं भुजैस्तु तत । उद्धर्तुमैच्छत्क्ष्मा तेन चकम्पेऽप्यचलं तु तत् ।।२८।।**
**महाबलेश्वर इति लिङ्गं तत्संज्ञितं ततः । गोकर्णवद्बलोद्धृत्या जातं तत्संज्ञितं स्थलम् ।।२९।।**
**कैलासोऽयं क्षितौ साक्षाद्यत्रेशः परिवारयुक् । सदा जागर्त्यतस्तत्र स्थिता देवर्षिसज्जनाः ।।३०।।**
**देवर्ष्यसुररक्षोनृ-तिर्यग्भिर्यत्र शंकरात् । लब्धोऽभीष्टो वरो नान्यदितः सत्पावनं स्थलम् ।।३१।।**

इति उक्त्वा सः किंचित् विश्रम्य स्वः सुरेषु पश्यत्सु तं (रावणं) त्रिः आहूय, हरिं स्मृत्वा लिंगं भुवि अस्थापयत्।२७। सः अपि एत्य (लिंगं) स्थापितं दृष्ट्वा अर्भं संताड्य भुजैः तत् (लिंगं) उद्धर्तुं ऐच्छत्। तेन क्ष्मा चकम्पे। तत् (लिंगं) तु अचलं (जातम्)।२८। तत् लिंगं महाबलेश्वर इति संज्ञितम्। ततः बल+उद्धृत्या गोकर्णवत् जातम्। तत् (गोकर्ण)संज्ञितं स्थलं (लिगं च जातम्)।२९। अयं क्षितौ साक्षात् कैलासः (अस्ति)। यत्र ईशः परिवारयुक् सदा जागर्ति। अतः तत्र देव+ऋषि+सज्जनाः स्थिताः।३०। यत्र देव+ऋषि+असुर+रक्षः+नृ+तिर्यग्भिः अभीष्टः वरः लब्धः। इतः अन्यत् सत्पावनं स्थलं न।३१।

एवढे बोलून गणेशाने थोडा वेळ वाट पाहून, (कौतुक पहायला जमलेल्या) स्वर्गस्थ देवांच्या साक्षीने त्याला (रावणाला) तीन वेळां बोलावून विष्णुस्मरणपूर्वक लिंग भूमीवर स्थापन केले.२७. त्या असुरानेही परत येऊन लिंग खाली ठेवलेले पाहून त्या मुलाला टोले देऊन आपल्या भुजांनी तें लिंग उचकटायचा प्रयत्न केला. त्याने भूमीसुद्धा कम्पित झाली; पण ते लिंग मात्र अचलच राहिले.२८. त्यावरून त्या लिंगाला महाबलेश्वर असे नांव पडले! तसेच जोराने उचकटल्याने ते गाईच्या कानाच्या आकाराचे झाले. त्यामुळे ते स्थळ आणि लिंग गोकर्ण या नांवाने ओळखले जाऊं लागले.२९. हा भूमीवर साक्षात् कैलासच आहे जिथे भगवान सदाशिव सपरिवार भक्तांच्या कामना पूर्ण करीत सदैव जागे असतात. म्हणजेच म्हणून तिथे देवता, ऋषी आणि साधुसंत यांचाही नित्य वास असतो.३०. जिथे देव, ऋषी, असुर, राक्षस, मानवच काय पण प्राण्यांनाही ईप्सित वराची प्राप्ती झाली आहे अशा या गोकर्णासमान शीघ्र पावन करणारे स्थान दुसरे नाही.३१.

**शृणु किञ्चिद्वसिष्ठेन शप्तोऽज्ञानकृतागसः । राक्षसत्वं द्वादशाब्दं प्राप मित्रसहो नृपः ॥३२॥**
**तदाहनद् द्विजं तत्स्त्रीः शापान्ते नृप पूर्ववत् । भूत्वाप्येष्यसि मच्छापाद्रतेऽन्तमिति तं जगौ ॥३३॥**

शृणु किञ्चित्। अज्ञानकृत+आगसः मित्रसहः नृपः वसिष्ठेन शप्तः द्वादश+अब्दं राक्षसत्वं प्राप।३२। तदा द्विजं अहनत्। तत्+स्त्रीः तं जगौ, 'हे नृप! शापान्ते पूर्ववत् भूत्वा अपि मत्+शापात् रते (तव) अंतम्।'इति।३३।

सिद्ध मुनि नामधारकाला सांगत आहेत, 'जरा ऐक! इथे पुराणातील एका कथेचा संदर्भ आहे. एकदां मित्रसह नांवाच्या इक्ष्वाकु वंशांतील राजाने अरण्यातील एका राक्षसाचा वध केला. त्या राक्षसाच्या भावाने कपटाने राजाचा सेवक होऊन त्याची मर्जी संपादन केली आणि सूडासाठी योग्य संधीची वाट पाहूं लागला. एकदां आपल्या घरी आलेल्या वसिष्ठांना भोजनाचे आमंत्रण देऊन राजा कांही कार्यांत व्यस्त झाला असतां तिथे राक्षसाने वसिष्ठांचे रूप धरून जेवणासाठी मृगमांसाची मागणी केली. राजाने त्याप्रमाणे व्यवस्था केली. जेवायला वाढतांना त्या कपटवेषांतील राक्षसाने मृगमांसाऐवजी नरमांसच आणून वाढले. वसिष्ठ मुनींनी रागावून राजाला शाप दिला. 'आपण मागणी केल्यानुसार सर्व पाक केला असतांना हा उगीचच मला शाप दिलात. आतां मीसुद्धां आपणांस शाप देतो,' असे म्हणून राजानेही हातांत पाणी घेतले. एवढ्यांत त्याची राणी मध्ये पडली आणि राजाला प्रार्थनेने गुरुशापाच्या दुष्कर्मापासून परावृत्त केले. वसिष्ठांनाही ध्यानाद्वारे झालेला सर्व प्रकार लक्षांत आला. तेव्हा ते म्हणाले, माझा शब्द खरा होणारच; पण शापानुसार तू बारा वर्षे ब्रह्मराक्षस होऊन परत राजा होशील. तेव्हां राजाने हातांतले शापजल खाली सोडून दिले ते त्याच्या पायांवर पडले. त्यायोगें तो कल्माषपाद नांवाचा ब्रह्मराक्षस झाला.३२. त्या राक्षसावस्थेत असतांना राजाने अरण्यातील वाटेने जाणाऱ्या ब्राह्मण दंपतीपैकी पतीला, त्याची पत्नी सारखी काकुळतीने परावृत्त करीत असातांनाही, मारून खाऊन टाकले. त्या वेळी आपल्या पतीच्या अस्थी सांवडतांना ती ब्राह्मणी म्हणाली, 'अरे राजा! शापाचा काळ संपल्यावर जेव्हा तू पुनश्च राजा होशील तेव्हां स्त्रीशी समागम करतांच तुझा अंत होईल!'३३.

**अथैष पूर्ववद्भूत्वा स्वं राज्यं प्राप्य दुःखितः । स्मरातुरायै महिष्यै साध्वीशापं शशंस राट् ।।३४।।**
**ततः खिन्नावुभौ तीर्थ-यात्रासक्तौ यदृच्छया । आयान्तं गौतमं दृष्ट्वा सर्वं तस्मै शशंसतुः ।।३५।।**
**गौतमोऽप्याह भो मा भीर्गोकर्णेऽघौघहारिणि । कामिकल्पद्रुमे क्षेत्रे किं भवेद्ब्रह्महत्यया ।।३६।।**
**तीर्थानि सर्व तोयानि शैवलिङ्गानि ताः शिलाः । लिङ्गतीर्थमये तत्र दिव्ये किं दुर्लभं नृणाम् ।।३७।।**

अथ एष पूर्ववत् भूत्वा राज्यं प्राप्य दुःखितः कामातुरायै महिष्यै राट् साध्वी शापं कथयामास।३४। ततः उभौ खिन्नौ तीर्थ+यात्रा+सक्तौ यदृच्छया गौतमं आगतं दृष्ट्वा तस्मै सर्वं शशंसतुः।३५। गौतमः अपि आह, भो (राजन्), मा भीः। अघ+ओघ+हारिणि कामि+कल्पद्रुमे गोकर्णे क्षेत्रे (विद्यमाने) ब्रह्महत्यया किं भवेत्?३६। तत्र सर्व तोयानि तीर्थानि, ताः शिलाः शैवलिङ्गानि। तत्र लिङ्ग+तीर्थमये (क्षेत्रे) नृणां किं दुर्लभम्?३७।

बारा वर्षांनी राक्षसत्वाचा परिहार झाल्यावर तो पूर्वीप्रमाणे राज्यकारभार पाहूं लागला. पण ब्रह्महत्येचे पाप आणि त्या ब्राह्मणीचा शाप यांमुळे तो दुखीकष्टी असायचा. एकदां त्याची राणी कामातुर होऊन त्याच्याकडे आली असतांना तिला राजाने आपल्याला झालेला साध्वीचा शाप निवेदन केला.३४. तेव्हां दोघेही दुःखीकष्टी झाले आणि ब्रह्महत्येच्या परिमार्जनासाठी तीर्थयात्रेला निघाले. त्यावेळी स्वेच्छेने भूमीपर्यटण करणारे गौतम ऋषी त्यांना दिसले. त्यांचा यथोचित सत्कार करून त्या पतिपत्नींनी त्याना आपले दुःख निवेदन केले.३५. गौतमांनी राजाला धीर दिला. म्हणाले, 'अरे राजा! गोकर्णासारखे पापांचे पुंज नष्ट करणारे आणि सकाम लोकांना कल्पवृक्षासारखे इष्ट देणारे क्षेत्र या भूतलावर असतांना ब्रह्महत्येचे काय भय धरतोस?३६. तिथे सर्वच जलाशय आणि जलप्रवाह तीर्थस्वरूप आहेत. महापापीसुद्धां ज्यांच्यायोगे तरून जातो ('तीर्यते अनेन') त्याला तीर्थ म्हणतात. तसेच तेथील सर्वच दगड-धोंडे ही अर्चनीय अशी शिवलिंगेच आहेत. अशा तीर्थ आणि लिंगांनी संपन्न असलेल्या त्या गोकर्ण क्षेत्रांत मानवांना दुर्लभ असे काय आहे?' सर्व कांही सुलभच आहे. तीर्थांच्या दर्शन, स्पर्शन, स्नान, पान इत्यादींनी अंतःकरणाची शुद्धी होते. तसेच शिवलंगांच्या पूजेने आणि वंदनाने शंभुप्रसादाने चित्ताची एकाग्रता लाभते. अशा प्रकारे मोक्षसुद्धा सुलभच आहे, हेच इथे सुचविले आहे.३७.

**शृणु तत्र मया दृष्टा चण्डाल्येका मृता तु ताम् । शिवदूता विमानेन कैलासं नेतुमागताः ।।३८।।**
**मया पृष्टास्तु ते प्रोचुः प्राग्वृत्तं शृणु गौतम । प्राग्भवे विप्रकन्येयं बाल्येऽभूद्विधवा विधेः ।।३९।।**
**तन्वी कामपरा नित्यं युवसौन्दर्यमोहिता । वृत्वा कान्तं विशं भेजे सौपपत्यं रहोऽपि तत् ।।४०।।**
**जातं लोकप्रसिद्धं हि मलो नाच्छाद्यतेऽपि कैः । सम्बन्धिनस्तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं तदाऽभजन् ।।४१।।**
**ततो रेमेऽपशङ्कं सा पानासक्ता मदोद्धता । विशः कुटुम्बिनी भूत्वा कन्दर्पहतचेतना ।।४२।।**

शृणु। तत्र मया एका चण्डाली मृता दृष्टा। शिव+दूताः तां विमानेन कैलासं नेतुमागताः।३८। मया पृष्टाः तु ते प्रोचुः। (हे) गौतम, प्राक् वृत्तं शृणु। इयं प्राक् भवे विप्रकन्या। विधेः बाल्ये विधवा अभूत्।३९। सा तन्वी नित्यं कामपरा युव सौंदर्य मोहिता विशं कान्तं वृत्वा रहः औपपत्यं भेजे। तत्..।४०। (तत्) लोकप्रसिद्धं जातम्। मलः कैः अपि न आच्छादते। तदा सम्बन्धिनः तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं अभजन्।४१। ततो सा कन्दर्पहतचेतना विशः कुटुम्बिनी भूत्वा पानासक्ता मदोद्धता अपशङ्कं रेमे।४२।

'राजा मी प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत सांगतो ती ऐक. मी तिथे (गोकर्ण क्षेत्रांत) एक चांडाळीण मरतांना पाहिली. तर काय आश्चर्य, तिला कैलासावर नेण्यासाठी शिवदूत विमान घेऊन आले.'३८. मी त्यांना विचारल्यावर ते मला म्हणाले, 'अहो गौतम ऋषी, हिचा पूर्वीचा वृत्तांत ऐका. मागील जन्मी ही ब्राह्मणकन्या होती. दैवगतीने ती बालपणीच विधवा झाली.३९. ती रूपवती आणि सतत कामचिंतनाने तरुणांच्या सौंदर्याने मोहित होत असे. एकदां तिने एका गोऱ्यागोमट्या वैश्य तरुणासह व्यभिचाराने संबंध ठेवला. चोरून केले तरी ते दुष्कृत्य.४०. लोकांत प्रकट झालेच. पाप कुणाला (**कैः**) झांकून ठेवतां येत नाही. **कैः** म्हणजे पाण्याने मल (विष्टा) झांकतां येत नाही असाही अर्थ लावतां येईल. तेव्हा तिच्या नातेवाइकांनी तिला घराबाहेर काढून संसर्गदोषाच्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त घेतले.४१. मग तर कामविकाराने विवेकशून्य होऊन मद्याच्या आहारी जाऊन त्याच धुंदींत ती वैश्यासह राजरोस संसार करूं लागली.४२.

**प्रमत्ता सैकदा वत्सं मेषभ्रान्त्या निहत्य कम् । स्थापयित्वाऽत्तुमन्येद्युः शेषं पक्त्वा चखाद ह ।।४३।।**
**ज्ञात्वाऽथ गोशिरो जार-भीत्या निक्षिप्य तद्भुवि । व्याघ्रेणापहृतो वत्सः शिवेत्थं पर्यदेवयत् ।।४४।।**
**इत्याद्यवाच्यपापानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समम् । दारुणां दुर्गतिं भुक्त्वा जातेदृश्यघशेषतः ।।४५।।**
**जन्मतोऽस्या गलत्कुष्ठ आन्ध्ये सत्यपि रक्षिता । पितृभ्यां तावपि मृतौ ततोऽनाथा रुरोद सा ।।४६।।**
**संगत्य यात्रिकैः सत्रा माघे दैवादिहागता । क्षुधिता शिवरात्रौ सा ययाचेऽन्नं सुदुःखिता ।।४७।।**

एकदा सा प्रमत्ता मेष+भ्रांत्या वत्सं निहत्य कं अन्ये द्युः अत्तुं स्थापयित्वा शेषं पक्त्वा चखाद ह।४३। अथ गोशिरो ज्ञात्वा तत् जार+भीत्या भुवि निक्षिप्य 'शिव (शिव), वत्सः व्याघ्रेण अपहृतः' इत्थं पर्यदेवयत्।४४। (सा) इत्यादि अवाच्य पापानि कृत्यानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समं दारुणां दुर्गतिं भुक्त्वा अघशेषतः ईदृशी जाता।४५। अस्या जन्मतः गलत्कुष्ठम्। आन्ध्ये सति अपि (सा) पितृभ्यां रक्षिता। तौ अपि मृतौ। ततः अनाथा सा रुरोद।४६। दैवात् सा माघे यात्रिकैः सत्रा इह आगता। सा क्षुधिता सुदुःखिता शिवरात्रौ अन्नं ययाचे।४७।

एकदां दारू पिऊन तर्र असतांना तिने बकरा समजून गाईचे वांसरूंच कापले आणि डोके दुसऱ्या दिवशी खायला शिंक्यावर ठेवून बाकीचे शिजवून खाऊन टाकले.४३. सकाळी ते वांसराचे डोके पाहून, ते तिने जाराच्या भीतीने जमिनीत गाडून टाकले आणि 'देवा, देवा! वासरूं वाघाने धरून नेले हो!' असे म्हणून खोटेच रडूं लागली.४४. अशी जिभेवर आणण्यासही अनुचित अनेक दुष्कृत्ये करून मेल्यावर आपल्या संबंधितांसह दारुण नरकांत पिचून पापाचा भोग झाल्यावर उर्वरित पापामुळे ती ही अशी चांडाळाच्या घरी जन्म पावली.४५. हिला जारकर्माच्या फलस्वरूप हिचे शरीर जन्मतःच कुष्ठग्रस्त होते. तसेच गाईचे वांसरूं मारल्याने ती आंधळी होती. अशा अवस्थेत आईवडील होते तोंपर्यंत त्यांनी तिचा सांभाळ केला. त्यांच्या मृत्यूनंतर ती लाचार होऊन दुःखाकष्टांत कशीबशी जगूं लागली.४६. दैवयोगाने ती यात्रेकरूंच्या बरोबर माघ महिन्यात इथे (गोकर्ण क्षेत्रांत) आली. शिवरात्रीच्या दिवशी भुकेने कासावीस होऊन ती येणाऱ्याजाणाऱ्यांकडे खायला मागूं लागली.४७.

**जनैस्तदाशनाभावात्प्रसारितकरेऽर्पितम् । बिल्वमाघ्राय तत्याज मत्वाऽभक्ष्यं सुदुःखिता ।।४८।।**
**लिङ्गे त्यक्तं तु तत्पूजा श्रुतमह्नीशकीर्तनम् । उपवासोऽशनाभावाद् दुःखाज्जागरणं निशि ।।४९।।**
**एवं साङ्गं व्रतं चीर्णं तेन भूत्वा सुनिर्मला । मृताऽद्यात्र शिवाज्ञप्ताः स्म आनेतुमिमां द्रुतम् ।।५०।।**
**तैरित्युक्त्वाऽमृतं सिक्त्वा विमानाग्रे निधाय ताम् । जग्मुः कैलासं सहोत्थ-क्रियागतिरियं त्विह ।।५१।।**

तदा अशन+अभावात् (तस्याः) प्रसारित+करे अर्पितम् बिल्वं आघ्राय सा सुदुःखिता अभक्ष्यं मत्वा तत्याज।४८। लिङ्गे त्यक्तं तत् तु पूजा जाता। अह्नि ईश+कीर्तनम् श्रुतम्। अशन+अभावात् उपवासो (जातः)। निशि दुःखात् जागरणं (जातम्)।४९। एवं व्रतं सांगं चीर्णम्। तेन (सा) सुनिर्मला भूत्वा अद्य अत्र मृता। (वयं) इमां (कैलासं) आनेतुं शिव+आज्ञप्ताः स्म।५०। तैः इति उक्त्वा अमृतं सिक्त्वा तां विमान+अग्रे निधाय कैलासं जग्मुः। इयं तु इह सह+उत्थ+क्रिया+गतिः।५१।

तेव्हां (सगळ्यांना उपवास असल्याने) खाद्य वस्तूंच्या अभावी तिच्या पुढे केलेल्या हातावर कुणी तरी बेलाचे पानच टाकले. तिने ते हुंगून पाहतां खाण्यायोग्य नाही असे जाणून चरफडत टाकून दिले.४८. ते लिंगावर जाऊन पडले. तीच पूजा झाली! दिवसभर देवाचे भजन कांनांवर पडले. खायला कांहीच न मिळाल्याने उपास घडला. रात्रभर दुखाने तळमळत झोंप कसली येणार?४९. ‘असे तिच्याकडून हे शिवरात्रीचे व्रत, शिवार्चन, उपोषण, जागरण, कीर्तन या सर्व अंगासहित, यथासांग पार पडल्याने तिच्या पापांचे क्षालन होऊन ती अतीव शुद्ध झाली आणि आजच्या ह्या पवित्र दिवशी या पावन क्षेत्री हिला मृत्यू आला. त्यामुळे भगवान महादेवांनी आम्हांला हिला कैलासावर घेऊन येण्याची आज्ञा केली आहे.’५०. त्यांनी असे सांगून तिच्यावर अमृत शिंपून तिला विमानांत पुढे बसविले आणि कैलासाला निघून गेले. असे बोलून गौतम राजाला म्हणाले, ‘ही ह्या भूलोकांत सहज घडलेल्या कर्माने प्राप्त होणारी सामान्य गती आहे.५१.

**विदुषस्तु फलाधिक्यं ज्ञात्वेदं गच्छ मुच्यसे । तच्छ्रुत्वा द्राङ् नृपो गत्वा क्षणान्मुक्तो बभूव ह ।।५२।।**
**गोकर्णमीदृशं क्षेत्रं सत्तमं सज्जनाश्रयम् । अतस्तत्रैव तस्थौ हि श्रीपादः साधुजीवनः ।।५३।।**
**मोचयित्वा सतोऽब्दांस्त्रींस्तत्रोषित्वा गतागतात् । कृष्णातटे कुरुपुरं प्राप्यादृश्योऽभवत्स तु ।।५४।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे गोकर्णवर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ।।६।।**

विदुषस्तु फलाधिक्यं इदं ज्ञात्वा गच्छ। तत् श्रुत्वा नृपः (गोकर्णं) द्राक् गत्वा क्षणान् मुक्तो बभूव ह।५२। ईदृशं सत्तमं सज्जन+आश्रयं गोकर्णं क्षेत्रम् (अस्ति)। अतः साधु+जीवनः हि श्रीपादः तत्र एव तस्थौ।५३। सतः गतागतात् मोचयित्वा तत्र त्रीन् अब्दान् उषित्वा कृष्णातटे सः कुरुपुरे प्राप्य तु अदृश्यो अभवत्।५४।

'जाणून कर्म केलेल्या कर्माचे फळ यापेक्षां अधिकच आहे हे समजून, हे राजा तूं गोकर्णाला जा.' ज्ञानी पुरुषाला कर्माचे अधिक फळ मिळते याचा अर्थ ते मोक्षपर्यवसायी होते. यावर कुणी असा निष्कर्ष काढला की ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने मोक्ष मिळतो तर ते बरोबर नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:१६) *'कर्मणा पितृलोको विद्यया देवलोक'* असे ज्ञानयोग आणि कर्मयोगाचे भिन्न फळ सांगितले आहे. त्यामुळे एकच साधक त्या दोन्हींचे एकाच वेळी अनुष्ठान करूं शकत नाही. कर्मयोगाने ज्ञानाचा अधिकार प्राप्त करून घेऊन मग कर्मसंन्यास केल्यावरच ज्ञानयोगाची साधना शक्य आहे. ह्या ठिकाणी ज्ञान म्हणजे क्रियेसंबंधाचे ज्ञान असाच घ्यावा लागेल. अशाच ज्ञानाने कर्माचे अनुष्ठान शक्य आहे. *'विद्यां चाविद्यां च'* इत्यादि श्रुतींत (ईशावास्योपनिषत् ११) विद्येने अमृतत्वाची प्राप्ती प्रतिपादलेली आहे. हे अमृतत्व सापेक्ष आहे. जिथे मृत्यू नाही अशा देवत्वाला (*अमृतं देवात्मभावम्* - भ.पू.पा. शंकराचार्य) अमृतत्व म्हटले आहे. मोक्ष अद्वितीय आत्मज्ञानानेच होतो. राजा गोकर्णाला जाऊन मुक्त झाला म्हणजे दोषमुक्त झाला आणि

ज्ञानाचा अधिकारी झाला असा अर्थ आहे.५२. असे हे गोकर्ण परमपवित्र क्षेत्र साधुसंतांना आश्रयभूत आहे. म्हणून संतांचा प्राणच असे श्रीपाद तिथेच राहिले.५३. सज्जनांना जन्ममरणरूपी संसारापासून सोडवीत तिथे (गोकर्ण क्षेत्री) राहून ते श्रीपाद कृष्णाकांठी कुरुगड्डी येथे जाऊन अदृश्य झाले.५४.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सहावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## । अथ सप्तमोऽध्यायः।

**।। नामधारक उवाच ।।**

**साधूनुद्धर्तुकामोऽथ कुतो लीलाविहार्यभूत् । अदृश्यो भगवांस्तत्तु श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**अतीन्द्रियोऽपि दृश्योऽत्र भूत्वा लीलात्मना पुनः । अवतारप्रसङ्गेन जातोऽदृश्य इदं शृणु ।।२।।**
**तत्राभूच्छान्दसः कश्चिदम्बिका नाम तद्वधूः । कुपुत्रं सुषुवे दैवात्स्तब्धं हीनमतिं जडम् ।।३।।**

अथ साधून् उद्धर्तुकामः लीलाविहारी भगवान तु कुतो अदृश्यो अभूत्? तत् सादरं श्रोतुं इच्छामि।१। अतीन्द्रियः अपि लीलात्मना दृश्यः भूत्वा पुनः अवतारप्रसंगेन अदृश्यः जातः। इदं शृणु।२। तत्र कश्चित् छांदसः अभूत्। तत्+वधूः अम्बिका नाम दैवात् स्तब्धं, हीनमतिं, जडं कुपत्रं सुषुवे।३।

श्रीगणेशाय नमः। मागच्या अध्यायांत 'श्रीगुरू साधूंना जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवतात' असे सांगितले; ते कोणत्या साधनाने?, हा प्रश्न अपेक्षून, विशेषतः मंद अधिकाऱ्यांसाठी, 'ज्ञानयोगांतच अंतर्भूत असलेल्या भक्तियोगाने', असे उत्तर ह्या अध्यायात दर्शविले आहे. **सातव्या अध्यायी ब्राह्मणीचे दुःख परिहरले। चोरांस मारून मृत द्विजास उठवीले।।** नामधारक विचारतात, साधूंचा उद्धार करूं इच्छिणारा लीलादेहाने विचरणारा भगवंत कां अदृश्य झाले हे मी आदरपूर्वक ऐकूं इच्छितो.१. सिद्धमुनी सांगतात, मन, बुद्धी, इंद्रियांना अगोचर असलेले श्रीदत्तप्रभू लीलादेहाने प्रकट झाले. पुढे पुन्हां दुसरा अवतार घ्यायचा असल्याने ते अंतर्धान पावले; ती गोष्ट सांगतो, ऐक.२. तिथे कुरुपुरांत एक वैदिक ब्राह्मण आपली पत्नी अंबिकेसह राहत होता. दैवयोगाने तिने एका मठ्ठ, मंदमती, वेडसर मुलाला जन्म दिला.३.

**वर्णधर्मोपनीतं तं सावित्र्युच्चारणाक्षमम् । ताडयन्तं निवार्याह स्वपतिं वैदिकं वधूः ।।४।।**
**भो जडोऽर्भोऽश्मवद्योनेरेवालं खेदहेतुना । ताडनेन त्यजाम्यस्मिंस्ताडितेऽसून्सुधीरिति ।।५।।**
**सोऽप्यजाकण्ठकुचवत्तं मत्वाश्रुत्य तद्वचः । तूष्णीं तस्थौ ततो विप्रः कालेनाल्पीयसा मृतः ।।६।।**
**तत्र पुत्रान्विता माता जीवनं याच्ञयाऽकरोत् । काले याते कियत्येवं निन्दां चक्रुर्द्विजोत्तमाः ।।७।।**

वर्णधर्म+उपनीतं (अपि) सावित्री+उच्चारण+अक्षमं तं ताडयन्तं वैदिकं स्वपतिं निवार्य वधू आह।४। भो योनेः+एव अर्भः अश्मवत् जडः (अस्ति)। खेदहेतुना (तस्य) ताडनं अलम्। सुधीः, अस्मिन् ताडिते असून् त्यजामि।५। सः अपि तत्+वचः श्रुत्वा, तं अजा+कंठ+कुच+वत् मत्वा तूष्णीं तस्थौ। ततो अल्पीयसा कालेन विप्रः मृतः।६। पुत्र+अन्विता माता तत्र याच्ञया जीवनं अकरोत्। एवं कियति काले याते द्विज+उत्तमाः निन्दां चक्रुः।७।

आठव्या वर्षी ब्राह्मणाची मुंज करावी ह्या धर्माज्ञेप्रमाणे त्याच्या पित्याने त्याची मुंज लावून दिली तरी त्याला गायत्रीमंत्राचा साधा उच्चारही करतां येईना. त्यामुळे त्याच्यावर रागावून तो वैदिक ब्राह्मण त्या मुलाला मारूं लागला. ते न पाहवून त्याची पत्नी त्याला अडवून म्हणाली.४. ‘अहो नाथ! जन्मतःच हा बाळ दगडासारखा बुद्धिहीन आहे. त्याच्यावर रागावून काय उपयोग आहे? आपण वैफल्याने त्याला असे ऊठसूट मारूं नका. आपण सूज्ञ आहांत. याउप्पर त्याला असे बडवाल तर मीच जीव देईन!’५. त्या ब्राह्मणानेही तिचे ते बोलणे ऐकले आणि ‘हा शेळीच्या गळ्याला लोंबणाऱ्या स्तनाप्रमाणे निरुपयोगी आहे’ असा विचार करून गप्प राहिला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी तो ब्राह्मण मरण पावला.६. मग ती माता आपल्या पुत्राबरोबर त्या कुरुपुरांत भिक्षा मागून चरितार्थ चालवूं लागली. असा कांही काळ गेल्यावर त्या गांवातले श्रेष्ठ ब्राह्मण त्याची निंदा करूं लागले.७.

**सूर्यर्च्यजैषा वृत्तिस्ते गर्ह्याऽस्माकं न रोचते । इतो व्रज त्यजासून्वा तैरित्युक्तो नदीं ययौ ।।८।।**
**कृष्णाविष्टं समं मात्रा मर्तुकामं विलोक्य तौ । निषिध्योचेऽनुकम्पार्द्रः श्रीपादस्तीरवास्यसौ ।।९।।**
**साहसं मा कुरु ब्रह्मन्नात्महत्या हि दुर्वहा । भवे भवेऽप्यतोऽत्रैव सम्प्राप्तसहनं वरम् ।।१०।।**

हे सूरि+अर्च्यज! ते एषा गर्ह्या वृत्तिः अस्माकं न रोचते। इतो व्रज वा असून त्यज।८। तैः इति उक्तः (पुत्रः) मात्रा समं मर्तु+कामं नदीं ययौ। कृष्णाविष्टं तौ विलोक्य असौ तीरवासी श्रीपादः अनुकम्पा+आर्द्रः उचे।९। हे ब्रह्मन्! साहसं मा कुरु। आत्महत्या हि दुर्वहा। अतो भवे भवे अत्र एव संप्राप्त+सहनं वरम्।१०।

'विद्वानांत पूज्य असलेल्या पित्याच्या पोटी जन्म घेऊन तू ही जी आईच्या भिकेवर पोट भरण्याची निंद्य वृत्ती अवलंबिली आहेस ती आम्हांला रुचत नाही. तूं इथून निघून जा किंवा कुठे तरी जाऊन जीव दे!' त्यांच्या ह्या वक्तव्याने व्यथित होऊन तो मुलगा आपल्या मातेसह जीव देण्यासाठी नदीवर गेला.८. जीव देण्यासाठी कृष्णेत प्रवेश करणाऱ्या त्या मायलेकरांना पाहून तीरावर असलेल्या ह्या श्रीपादप्रभूंना दया आली आणि ते म्हणाले.९. 'अरे ब्राह्मणा! असा अविचार करूं नकोस. जाणीवपूर्वक ब्राह्मणाने आत्महत्या केली तर आत्महत्येच्या पापाबरोबरच ब्रह्महत्येचेही पाप लागते. ईशावास्य उपनिषदात(३) सांगितल्याप्रमाणे आत्महत्या करणारे लोक मृत्यूनंतर सूर्यरहित गाढ अंधाराच्या लोकांत जातात. म्हणून जन्मोजन्मी आपल्या प्रारब्धाने जे जे कष्ट प्रप्त होतील ते ते भोगणेच बरे आहे.'१०.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**प्राज्ञोद्भूतकुपुत्रत्व-हेतुनैवाखिला हि माम् । धिक्कुर्वन्त्यपि नेक्षन्ति तत्किं कार्यमतःपरम् ।।११।।**

**।। श्रीपाद उवाच ।।**

**हत्यया लिप्स्यसेऽग्रेऽतो दुःखं निस्तीर्य दैविकम् । शिवतोषात्सुपुत्रस्ते भविष्यति भवान्तरे ।।१२।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**त्वयोक्तं साध्वहं कुर्यां तथैव तु कथं भवेत् । शिवतोषः पुरा केन कृतः श्रावय विस्तरात् ।।१३।।**

ब्राह्मणी उवाच। प्राज्ञ+उद्भूत+कुपुत्र+हेतुना एव अखिला (जना) मां धिक् कुर्वति हि। न ईक्षन्ति अपि। तत् अतः परम् किं कार्यम्?।११। श्रीपाद उवाच। हत्यया लिप्स्यसे। अतो दैविकं दुःखं निस्तीर्य अग्रे शिव+तोषात् भव+अंतरे ते सुपुत्रः भविष्यति।१२। ब्राह्मणी उवाच। त्वया साधु उक्तम्। अहं तु तथा एव कुर्याम्। शिवतोषः कथं भवेत्, पुरा केन कृतः (तत्) विस्तरात् श्रावय।१३।

मुलगा कांहीच बोलला नाही. आईनेच सांगितले. विद्वानाच्या पोटी हा नतद्रष्ट जन्माला आला. ह्याच गोष्टीवरून सर्वजण माझा धिक्कार करतात. आम्हांला डोळ्यांसमोरही येऊं देत नाहीत. अशा परिस्थितीत आम्ही (जीव देण्यावांचून दुसरे) काय करणार?११. श्रीपाद म्हणाले, '(तसे करशील तर) (आत्म)हत्येचा दोष लागेल. यासाठी कर्माने प्राप्त झालेले दुःख भोगून टाक. पुढे जर शंकराला (उपासनेने) प्रसन्न करशील तर जन्मांतरी तुला चांगला मुलगा होईल.'१२. ब्राह्मणी म्हणाली, 'आपण उत्तम सांगितले. मी अवश्य त्याचप्रमाणे करीन. भगवान शिव कसे प्रसन्न होतील? पूर्वी कुणी त्यांना अशा रीतीने प्रसन्न केले? हे मला आपण विस्ताराने सांगाल तर माझीही श्रद्धा आणि भक्ती दृढ होऊन मी तसे करीन.'१३. श्रीपाद सांगूं लागले, 'पूर्वीं उज्जैन नगरीत चंद्रसेन नांवाचा राजा होता. त्याचा मणिभद्र नांवाचा मित्र शंकराचा भक्त होता. त्याला भगवान शंकरांनी प्रसन्न होऊन इच्छिलेली वस्तू देणारा चिंतामणी दिला.१४.

## ।। श्रीपाद उवाच ।।

**उज्जयिन्यां पुरा चन्द्र-सेनराजसखोऽलभत् । मणिभद्रः शिवाच्छैवश्चिन्तामणिमभीष्टदम् ।।१४।।**
**तं ज्ञात्वार्घादिनाऽलभ्यं युद्धायाभ्यागतान्नृपान् । श्रुत्वाऽप्येकाग्रचित्तोऽसौ प्रदोषेऽपूजयच्छिवम् ।।१५।।**
**मन्दानङ्गप्रदोषे तं मणिं भूपं तथाविधम् । दृष्ट्वा गोपसुतास्तद्वत्स्वाङ्गणे चक्रुरर्चनम् ।।१६।।**
**गोप्यो निवार्य पत्राद्यैर्लिङ्गकल्पनयोपलम् । भजतो निन्युरत्तुं तांस्तस्थौ तत्रैकबालकः ।।१७।।**
**प्रसह्याप्युद्धृतोऽर्चां स मात्रोद्वास्यापतद्भुवि । शम्भुपूजाभङ्गभिया निर्विण्णो मर्तुमुद्यतः ।।१८।।**

श्रीपाद उवाच। पुरा उज्जयिन्यां चंद्रसेन+राज+सखः मणिभद्रः शिवात् अभीष्टदं चिंतामणिं अलभत्।१४। तं अर्घ+आदिना अलभ्यं ज्ञात्वा नृपान् युद्धाय अभ्यागतान् श्रुत्वा अपि असौ एकाग्रचित्तः प्रदोषे शिवं अपूजयत्।१५। तं मणिं, भूपं (च) मंदानंग+प्रदोषे तथाविधं दृष्ट्वा गोपसुताः स्वाङ्गणे तद्वत् अर्चनं चक्रुः।१६। लिंग+कल्पनया उपलं भजतः तां गोप्यो निवार्य अत्तुं निन्युः। तत्र एक बालकः तस्थौ।१७। मात्रा अर्चां उद्वास्य प्रसह्य उद्धृतः अपि सः शम्भु+पूजा+भंग+भिया निर्विण्णो मर्तुम् उद्यतः भुवि अपतत्।१८।

तो चिंतामणी धनादिकांच्या मोबदल्यांत मागूनही तो राजाने न दिल्यामुळे परकीय राजे सर्व बाजूंनी युद्धासाठी चालून आल्याचे समजूनही राजा आणि मणिभद्र प्रदोषकाळी एकाग्रचित्ताने शंकरांचे पूजन करीत होते.१५. त्या राजाला आणि मणिभद्राला शनिप्रदोषाच्या पर्वांत तशी पूजा करतांना पाहून कांही गवळ्याच्या मुलांनी आपल्या आंगणांत तशीच पूजा आरंभिली.१६. लिंगाच्या आकाराचा दगड ठेवून पानाफुलांनी त्यांची पूजा करणाऱ्या त्या मुलांना, त्यांच्या माता ज्या गोपी, त्यांनी जेवणासाठी ओढून नेले. सगळी मुले याप्रमाणे निघून गेली; पण एक बालक मात्र पूर्वजन्मींच्या भक्तीच्या संस्कारांमुळे पूजा टाकून न जातां तिथे तसाच बसून राहिला.१७. आईने पूजा विस्कटून त्याला जबरदस्तीने ओढूनही तो गोपीकुमार शिवपूजेचा भंग होईल या भीतीने अत्यंत खिन्न होऊन प्राण त्यागण्याच्या इच्छेने जमिनीवर पडला.१८.

**तद्भावं विश्वसाक्षीशो ज्ञात्वाऽविष्कृत्य शोभनम् । स्वं रूपं बालमाश्वास्य वरं वृण्विति तं जगौ ॥१९॥**
**बालोऽपि दिव्यरूपं तं नत्वोचे भुवनेश्वर । मात्रोत्सृष्टाऽत्र ते पूजा तन्मन्तुं क्षन्तुमर्हसि ॥२०॥**

**॥ शिव उवाच ॥**

**भक्त्या सायुज्यभाङ्मेऽसि कृतं मात्रा त्वबोधतः । नायं मन्तुः सापि भूयाद्विष्णुमाताऽर्चनेक्षणात् ॥२१॥**
**इत्युक्त्वान्तर्दधे सोऽभूद्भास्वल्लिंगं य आगताः । त ऊचुः पुण्यश्लोकार्थं दोषाऽप्यर्कोऽत्र तिष्ठति ॥२२॥**
**धन्येन सह योद्धव्यं नास्माभिरिति ते नृपाः । निश्चित्य स्निग्धभावेन तौ द्रष्टुं सर्व आययुः ॥२३॥**

विश्वसाक्षी ईशः तत्+भावं ज्ञात्वा स्वं शोभनं रूपं आविष्कृत्य, बालं आश्वास्य वरं वृणु इति तं जगौ।१९। बालः अपि तं दिव्यरूपं नत्वा ऊचे, (हे) भुवनेश्वर! मात्रा ते पूजा उत्सृष्टा, तं मन्तुं क्षन्तुं अर्हसि।२०। शिव उवाच। त्वं भक्त्या मे सायुज्यभाक् असि। मात्रा कृतं तु अबोधतः। न अयं मन्तुः। सा अपि अर्चन+ईक्षणात् विष्णुमाता भूयात्।२१। इति उक्त्वा सः अन्तर्दधे। लिङ्गं भास्वत् अभूत्। ये आगताः (राजानः) ते ऊचुः अत्र पुण्यश्लोक+अर्थं दोषा अपि अर्कः तिष्ठति।२२। अस्माभिः धन्येन सह न योद्धव्यम्। इति निश्चित्य ते सर्वे नृपाः स्निग्ध+भावेन तौ द्रष्टुं आययौ।२३।

जगताचा द्रष्टा जो भगवान शंकर त्याने त्या बालकाचा भक्तिभाव जाणला आणि आपले मनोहर रूप त्याच्यापुढे प्रकट केले. त्या बाळाची समजूत घालून ते त्याला वर माग असे म्हणाले.१९. त्या गोपाळाने त्या दिव्य रूपाला नमस्कार केला आणि म्हणला, माझ्या आईने आपली पूजा मोडून टाकली त्या अपराधाची आपण क्षमा करावी.२०. भगवान शंकर उत्तरले, तुझ्या भक्तीपोटी तुला माझे सायुज्य दिले! तुझ्या आईने अजाणतां केल्याने हा अपराधच होत नाही. उलट माझी पूजा तिने पाहिली ह्या पुण्याईने ती जन्मांतरी विष्णूची आई होईल.२१.असे बोलून शिवभगवान अंतर्धान पावले. गोपबालकाने पूजिलेले ते दगडाचे लिंग एकदम सूर्यासारखे प्रकाशले. त्याचा प्रकाश नगरभर पसरलेला पाहून युद्धासाठी आलेले राजे लोक म्हणूं लागले, हा राजा केवढा पुण्यश्लोक आहे! त्याच्या नगरांत रात्रीही सूर्य थांबलेला दिसतो!२२.

**पूजां कृत्वापि राट् द्योत-हेतुं निश्चित्य तैः सह । नृपैर्गोपाङ्गणं गत्वा प्राप लिङ्गेक्षणान्मुदम् ।।२४।।**
**श्रुत्वा गोपमुखात्सर्वं तुष्टास्तस्मै नृपाः श्रियम् । दत्वा गोपाधिपत्यं च स्वं स्वं स्थानं ययुर्मुदा ।।२५।।**
**सा तु प्रेत्य यशोदाख्या गोपी भूत्वा हरिं सुतम् । प्रापेशतोषात्तस्मात्ते तथा भूयाच्छिवार्चनात् ।।२६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**कष्टाद्दैवाच्छिवे तुष्टे फलं भाव्यधुनामुना । कष्टेनायुः कथं लङ्घ्यं मातृत्वेनाव मामतः ।।२७।।**

राट् अपि पूजां कृत्वा तैः नृपैः सह द्योत+हेतुं निश्चित्य गोप+अङ्गणं गत्वा लिङ्ग+ईक्षणात् मुदं प्राप।२४। गोप+मुखात् सर्वं श्रुत्वा तुष्टाः नृपाः तस्मै श्रियं गोप+अधिपत्यं च दत्वा मुदा स्वं स्वं स्थानं ययुः।२५।

हा राजा धन्य आहे! अशाबरोबर आपण युद्ध करणे योग्य नाही, असा निश्चय करून ते सगळे राजे स्नेहभावाने त्या राजाच्या आणि मणिभद्राच्या दर्शनासाठी आले.२३. राजानेही पूजा विधिवत् संपन्न केली आणि त्या राजांसह प्रकाशाचे मूळ शोधत गवळीवाड्यात आले.२४. तिथे त्या लिंगाचे दर्शन घेऊन ते सर्व आनंदित झाले. त्या गोपाळाच्या तोंडून सर्व ऐकून सर्वही राजांना हर्ष झाला. त्यांनी त्या गोपाळाला विपुल धन देऊन गौळी समाजाचा प्रमुख केले आणि आनंदाने आपापल्या ठिकाणी निघून गेले.२५. ती गोपी मृत्यूनंतर यशोदा नांवाची गोपी म्हणून जन्मली आणि भगवान शंकरांच्या कृपेने साक्षात् विष्णूचा अवतार जो गोपाळकृष्ण, त्याची आई झाली. त्याचप्रमाणे तू शंकरांची पूजा केलीस तर तुलाही विष्णूसारखा मुलगा होईल.२६. ब्राह्मणी म्हणाली, 'प्रयासाने आणि दैवयोगाने शंकर प्रसन्न झालेच तर पुढच्या जन्मी हे फळ मिळेल. आतां ह्या मंदमती मुलासह हे कष्टमय आयुष्य कसे घालवावे? आपणच मला आई समजून माझे रक्षण करावे.'२७.

**इत्यशाठ्यं सकारुण्यं श्रुत्वा प्रीतो दयार्द्रधीः । ओमित्युक्त्वा दधौ पाणिं दुष्प्रापं मूर्खमूर्धनि ।।२८।।**
**सहसा गीष्पतिसमो बभूव श्रुतिशास्त्रवित् । मातृभक्तौ विनीतं तं नियुज्याहाम्ब मे शृणु ।।२९।।**
**विस्मृत्याऽकमनेनेश-पूजयायुःक्षयं कुरु । पुत्रो भाविभवे मादृक्ते भविष्यति वा इति ।।३०।।**
**साऽप्यत्यर्थं प्रहृष्टा तदाज्ञया सहसूनुना । ग्रामं गत्वेशमानर्च विद्वन्मान्य सुतान्विता ।।३१।।**
**मादृङ्नान्यो भवेयं चेन्नास्याः पुत्रो मृषा वचः । अतोऽवतीर्य तत्कुर्यामित्यमंस्ताज ईश्वरः ।।३२।।**

सा तु प्रेत्य यशोदा+आख्या गोपी भूत्वा ईश+तोषात् हरिं सुतं प्राप। तस्मात् ते शिव+अर्चनात् तथा भूयात्।२६। ब्राह्मणी उवाच। कष्टात् दैवयोगात् (च) शिवे तुष्टे भावि फलम्। अधुना अमुना कष्टेन आयुः कथं लङ्घ्यम्? अतः मां मातृत्वेन अव।२७। इति अशाठ्यं सकारुण्यं (वचं) श्रुत्वा दया+आर्द्र+धीः प्रीतः 'ॐ' इति उक्त्वा मूर्ख+मूर्धनि दुष्प्रापं पाणिं दधौ।२८। सः सहसा गीष्पति+समः श्रुति+शास्त्र+वित् बभूव। विनीतं तं मातृ+भक्तौ नियुज्य आह, '(हे)अम्ब! मे श्रुणु'।२९। अनेन अकं विस्मृत्य ईश+पूजया आयु+क्षयं कुरु। भावि+भवे ते मादृक् पुत्रो भविष्यति वा।३०। सा अपि अत्यर्थं प्रहृष्टा। तत् आज्ञया सूनुना सह ग्रामं गत्वा विद्वत्+मान्य सुत+अन्विता ईशं आनर्च।३१। मादृक् अन्यः न। अस्याः पुत्रः न भवेयं चेत् (मम) वचः मृषा (स्यात्)। अतः अवतीर्य तत् कुर्यां इति अजः ईश्वरः अमंस्त।३२।

हे तिचे निर्व्याज आणि काकुळतीचे बोलणे ऐकून दयाक्लिन्न अंतःकरणाचे श्रीपाद प्रसन्न झाले आणि त्यांनी 'ॐ' असे म्हणून आपला देवदुर्लभ हात त्या मठ्ठ मुलाच्या मस्तकावर ठेवला.२८. तो मंदमती मुलगा तेव्हां तत्काळ बृहस्पतीसारखा वेदशास्त्रसंपन्न झाला आणि त्याने श्रीपादप्रभूंना नमस्कार केला. त्याला आईची भक्ती करण्याचा आदेश देऊन श्रीपाद त्या ब्राह्मणीला म्हणाले, 'माते, माझे ऐक!'२९. 'ह्या तुझ्या विद्वान् पुत्रासह तूं तुझे पूर्वीचे सर्व दुःख विसरून जा आणि उरलेले जीवन शंकरांच्या पूजेत व्यतीत कर. येणाऱ्या जन्मात तुला अवश्य माझ्यासारखा पूज्य मुलगा होईल.'३०. ती ब्राह्मणीही अत्यंत आनंदित होऊन श्रीपादांची आज्ञा घेऊन आपल्या मुलासह गांवांत गेली. तिथे सर्व विद्वानांतही सन्मानित झालेल्या त्या मुलासह तिने आयुष्यभर शंकरांचे आराधन केले.३१.

**कृतावतारसङकल्पः कार्यानन्त्यान्न सोऽत्यजत् । लीलाङ्गं तत्र भजतामदृश्योऽप्यस्ति कामदः ।।३३।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सङ्कल्पवान्कथं कार्येऽपूर्णेऽप्यन्योऽभवत्कथम् । स्थित्वाद्यधाम्नाऽदृश्योऽपि भजतां कामदः कथम् ।।३४।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**कार्यानन्त्याद्विश्वबीजे सङ्कल्पानन्त्यमव्यये । नृणां कलिमलान्धानां स प्रत्यक्षोऽप्यदृश्यवत् ।।३५।।**

कृत+अवतार+संकल्पः सः कार्य+आनंत्यात् लीलाङ्गं न अत्यजत्। तत्र भजतां अदृश्यः अपि कामदः अस्ति।३३। नामधारक उवाच। कार्ये अपूर्णे अपि संकल्पवान् कथम्? आद्य+धाम्ना स्थित्वा अपि अन्यः कथं अभवत्? (तत्र) अदृश्यः अपि भजतां कामदः कथम्?३४। सिद्ध उवाच। विश्व+बीजे अव्यये कार्य+आनंत्यात् संकल्प+आनंत्यम्। कलि+मल+अंधानां नृणां सः प्रत्यक्षः अपि अदृश्यवत् (अस्ति)।३५।

'माझ्यासारखा त्रिभुवनांत कुणीच नाही कारण मी एकमेवाद्वितीय आहे. म्हणजे मलाच तिच्या पोटी विशुद्ध सत्त्वात्मक स्वेच्छामय रूपाने अवतार घेतला पाहिजे. तरच माझे वचन सत्य होईल' असा त्या निर्विकार परमेश्वराने विचार केला.३२. अशा रीतीने पुढच्या अवताराचा संकल्प करूनही त्या दत्तप्रभूनी आपले भक्तरक्षणादि कार्य कधीही न संपणारे असल्याने तो लीलादेह टाकला नाही. तिथे श्रीपादवल्लभ अशुद्ध चित्ताच्या लोकांना अदृश्य असले तरी आपल्या भक्तांच्या कामना पूर्ण करीत आजही विद्यमान आहेत. मुंडकोपनिषदांत (२:१:२) ब्रह्माचे वर्णन शुद्ध आणि मन-प्राणानी रहित असे केले आहे. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:३) काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधीरता, लज्जा, भीती, बुद्धी ही सर्व मनाचीच रूपे सांगितली आहेत. तर मग अमनस्क परमेश्वराचा संकल्प कसा होऊं शकतो? तर परब्रह्माच्या ईक्षणासारखाच संकल्पाचाही प्रयोग निर्दोष आहे. माया त्याच्या आधीन असल्याने तो स्वतंत्रच आहे असा भाव आहे.३३.

**प्राग्वृत्तं शृण्वदृष्टेऽस्मिन्द्विजः कश्चित्कुटुम्ब्यभूत । धीमान्द्यात्स वणिग्वृत्तिः श्रीपादाङ्घ्र्यर्पितान्तरः ।।३६।।**
**व्यापारे मेऽधिलाभश्चेद्भूयात्तदनुसारतः । कुर्यां कुरुपुरे विप्र-भोजनं श्रीशतुष्टये ।।३७।।**
**इत्युक्त्वाऽगात्स्मरन्छ्रीशं व्यापारार्थं ततो धनम् । लेभे भूरि तदादाय ययौ संकल्पसिद्धये ।।३८।।**
**मार्ग एकाकिनं यान्तं तं सार्थं प्रेक्ष्य तस्कराः । सुहृत्तया तदनुगा भूत्वा तं विजनेऽहनन् ।।३९।।**

अस्मिन् अदृष्टे (सति)प्राक् वृत्तं शृणु। कश्चित् कुटुंबी द्विजः अभूत्। धी+मांद्यात् सः वणिक्+वृत्तिः श्रीपाद+अङ्घ्रि+अर्पित+अंतरः (स्यात्)।३६। मे व्यापारे अधिलाभः भूयात् चेत् तत्+अनुसारतः कुरुपुरे श्री+ईश+तुष्टये विप्र+भोजनं कुर्याम्।३७। इति उक्त्वा श्रीशं स्मरन् व्यापारार्थं अगात्। ततो भूरि धनं लेभे। तत् आदाय संकल्प+सिद्धये ययौ।३८। मार्गे एकाकिनं स+अर्थं यान्तं तं प्रेक्ष्य तस्कराः सुहृत्तया तत्+अनुगा भूत्वा तं विजने अहनन्।३९।

नामधारकास पडलेले तीन प्रश्न तो विचारीत आहे. कुरवपूरचे कार्य पूर्ण झालें नसतांना दुसऱ्या अवताराचा संकल्प कसा केला? पूर्वरूपाने राहूनही वेगळे रूप कसे धारण केले? श्रीपाद अदृश्य असूनही त्या कुरवपुरांत भक्ताच्या कामना कसे पूर्ण करतात? पुढील श्लोकापासून सिद्धमुनी याच तीन प्रश्नांची उत्तरे सांगत आहेत.३४. जगताचे मूळ असणाऱ्या परमात्म्याची कार्ये अनंत आहेत; त्यानुसार संकल्पही अनंतच होतात. श्रीपादांचे जरी कुरवपुरांत प्रत्यक्षच वास्तव्य असले तरी कलिकाळाच्या दोषाने आंधळ्या झालेल्या लोकांना ते अदृश्यासारखेच आहेत.३५. हे श्रीपादमुनी अदृश्य झाल्यानंतर एक जुनी घडलेली गोष्ट ऐक. कोणी एक ब्राह्मण गृहस्थ होता. बुद्धीच्या मंदतेमुळे तो ब्रह्मकर्म न करतां व्यापाराने चरितार्थ करीत असे. त्याच्या मनांत श्रीपादश्रीवल्लभांच्या ठायीं निस्सीम भक्ती होती.३६. मला व्यापारांत भरपूर नफा झाल्यास त्या प्रमाणांत श्रीपादवल्लभांना कुरुगड्डीत ब्राह्मणभोजनाने संतुष्ट करीन.३७. असा मनोमन नवस बोलून श्रीपादांचे स्मरण करीत तो परगांवी व्यापाराला निघाला. तेव्हां त्याला भरपूर पैसा मिळाला. तो पैसा घेऊन आपला बोललेला संकल्प पूर्ण करण्यासाठी तो कुरुगड्डीला निघाला.३८.

**तदैव सहसा तत्र श्रीपादः शूलपात्रधृक् । प्राप्य ताञ्छितधारेण त्रिशूलेन जघान सः ।।४०।।**
**एकस्तमेत्य शरणं प्रोचे चोरधिया तु नो । सङ्गीभूतोऽस्मि मां ज्ञात्वा यथेष्टं कुरु भो प्रभो ।।४१।।**
**श्रीपादोऽपि सकारुण्यां श्रुत्वोक्तिं विमलान्तरम् । ज्ञात्वा तं योजयामास तद्रक्षायै कृपार्द्रधीः ।।४२।।**
**कबन्धे तच्छिरः कृत्वा भस्माक्तं जलमन्त्रितम् । सजीवं तं द्विजं कृत्वा क्षणादन्तर्दधे स तु ।।४३।।**
**स सुप्तोत्थितवद्बुध्वा दृष्ट्वा चोरान्मृतान् द्विजः । हतशेषमुखात्सर्वं श्रुत्वा खिन्नान्तरोऽभवत् ।।४४।।**

तदा एव शूल+पात्र+धृक् श्रीपादः सहसा तत्र प्राप्य सः तान् शित+धारेण त्रिशूलेन जघान।४०। एकः तं शरणं एत्य प्रोचे। 'भो प्रभो, (अहं) तु चोर+धिया नो संगीभूतः अस्मि। मां ज्ञात्वा यथा+इष्टं कुरु'।४१। कृपा+आर्द्र+धीः श्रीपादः अपि सकारुण्यां उक्तिं श्रुत्वा तं विमल+अंतरं ज्ञात्वा तं तत्+रक्षायै योजयामास।४२। तत् शिरः कबंधे भस्म+आक्तं जल+मंत्रितम् कृत्वा तं द्विजं सजीवं कृत्वा स तु क्षणात् अन्तर्दधे।४३। स द्विजः सुप्त+उत्थितवत् बुद्ध्वा मृतान् चोरान् दृष्ट्वा हत+शेष+मुखात् सर्वं श्रुत्वा खिन्न+अंतरः अभूत्।४४।

त्या वाटेने त्याला पैसे घेऊन एकट्यानेच जातांना चोरांनी पाहिले आणि त्याच्याशी मित्रत्वाचे नाटक करून त्याला जंगलांत निर्जन ठिकाणी मारून टाकले.३९. त्याच वेळी शूल आणि कमंडलु धारण केलेले श्रीपाद एकाएकी तिथे आले आणि त्या चोरांना त्यांनी आपल्या तीक्ष्ण त्रिशूलाने ठार मारले.४०. त्यांच्यापैकीं एकजण श्रीपादांना शरण येऊन म्हणाला, 'महाराज! मी हे चोर असल्याचे न जाणतां यांच्याबरोबर आलो. आपण (हे) ओळखून आपल्याला वाटेल त्याप्रमाणे करा.'४१. दयेने ओथंबलेल्या अंतःकरणाच्या श्रीपादांनी ही काकुळतीची विनवणी ऐकून आणि त्याचे मन निष्कपट असल्याचे जाणून त्या ब्राह्मणाच्या रक्षणासाठी त्याची योजना केली.४२. त्या ब्राह्मणाचे डोके धडाला जोडून भस्मयुक्त मंतरलेल्या पाण्याने त्याला जिवंत केले आणि ते श्रीपाद क्षणार्धांत गुप्त झाले.४३. तो ब्राह्मण झोंपेतून जागावे तसा उठला. तेव्हां मरून पडलेले चोर त्याला दिसले. त्यांच्यापैकी उरलेल्याच्या तोंडून त्याने सर्व हकीकत ऐकली आणि तो खिन्नचित्त झाला.४४.

**कृत्वा तु मत्कृते कृच्छ्रं जातोऽयं चोरगोचरः । सर्वदाऽऽराधितो दैवान्नायं मे दृष्टिगोचरः ।।४५।।**
**इत्युक्त्वा धनमादाय गत्वा कुरुपुरं द्विजः । चतुःसहस्रसद्विप्र-भोजनं श्रद्धया व्यधात् ।।४६।।**
**ततः श्रीशप्रसादात्स सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । इत्याद्या भूरिशो वृत्ताः सत्यदृश्येऽपि तत्कथाः ।।४७।।**
**प्रत्यक्षस्तु सतां तत्र कच्चराणां त्वगोचरः । सोऽप्यन्यत्रावतीर्यात्र स्वरूपेणेष्टकामदः ।।४८।।**

'मत्कृते कृच्छ्रं कृत्वा तु अयं चोर+गोचरः जातः। सर्वदा आराधितः अयं दैवात् मे दृष्टि+गोचरः न'।४५। इति उक्त्वा द्विजः धनं आदाय कुरुपुरं गत्वा श्रद्धया चतुः+सहस्र+सत्+विप्र+भोजनं व्यधात्।४६। ततः सः द्विजः श्रीश+प्रसादात् उभयीं सिद्धिं प्राप। अदृश्ये सति अपि इत्याद्या तत्+कथाः भूरिशः वृत्ताः।४७। सः सतां तत्र प्रत्यक्षः, कच्चराणां तु अगोचरः (सन्) अन्यत्र अवतीर्य अपि अत्र स्वरूपेण इष्ट+कामदः।४८।

तो म्हणाला, 'ह्या श्रीपादांनी माझ्यासाठी एवढे कष्ट केले. पण चोरांना दर्शन देऊनही, सर्वदा त्यांची आराधना करणाऱ्या मला मात्र त्यानी दर्शन दिले नाही!'४५. असा खेद व्यक्त करून तो आपले धन घेऊन कुरुगड्डीला गेला. तिथे त्याने भक्तिभावाने चार हजार उत्तम ब्राह्मणांना भोजन घातले.४६. नंतर त्या ब्राह्मणाचे श्रीपादवल्लभांच्या प्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक कल्याण झाले. श्रीपादगुरू अदृश्य झाल्यानंतरही अशा कित्येक घटना घडल्या आहेत.४७. त्या श्रीगुरूंचा पापी लोकांना अनुभव येत नसला तरी साधूंना मात्र ते प्रत्यक्षच आहेत. दुसऱ्या ठिकाणी अवतरूनही इथे आपल्या पूर्वरूपाने ते भक्तांच्या कामना पुरवीत असतात.४८.

**वेदयज्ञतपोदान-प्रदिष्टफलतोऽधिकम् । श्रीपादाधिष्ठितस्थान-वासिनां द्राक्फलं लभेत् ।।४९।।**
**यत्र कुत्रापि ये केचिच्छ्रीपादाङ्घ्रिसरोरुहे । संस्मरन्त्यपि तेभ्यः स कामानिष्टान्ददात्यलम् ।।५०।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीपादमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः।।७।।**

वेद+यज्ञ+तपः+दान+प्रदिष्ट+फलतो श्रीपाद+अधिष्ठित+स्थान+वासिनां अधिकं फलं लभेत्।४९। यत्र कुत्र अपि ये केचित् श्रीपाद+अंघ्रि+सरोरुहे संस्मरन्ति अपि तेभ्यः सः इष्टान् कामान् अलं ददाति।५०।

वेदांच्या अध्ययनादिकांनी, यज्ञादींच्या अनुष्ठानाने, शरीरशोषणादि तपांनी, सत्पात्री केलेल्या दानाने मिळणाऱ्या फळापेक्षांही अधिक - म्हणजे मोक्षरूपी फळ, श्रीपादगुरूंनी पावन केलेल्या त्या कृष्णतीरींच्या स्थानांत राहणाऱ्यांना शीघ्र मिळते. जीवाचा देहाशी संबंध असतो त्याहून श्रीपादरूपाने अवतरलेल्या ईश्वराचा संबंध वेगळा आहे. जीव अविद्येच्या योगाने मिथ्याभूत षड्विकारयुक्त देहाशी ममत्वाने बद्ध होतो. याउलट नित्य, मुक्त, शुद्ध, मुक्त आणि सत्य स्वभावाचा भगवंत आपल्या योगमायेने चैतन्यघन असा लीलाविग्रह धारण करतो. साहजिकच त्याचे अधिष्ठान झालेल्या पुण्यक्षेत्रांतल्या निवासाने अनायासच त्याच्या प्रियतम भक्तांचा संग लाभतो. बहुशः भगवद्भक्त भगवंतांचे अधिष्ठानभूत अशा पुण्यक्षेत्रांतच राहतात. त्यामुळे तिथे राहणाऱ्यांना भगवद्गुणांचे श्रवण आणि कीर्तनही घडते. इतर ठिकाणी विघ्नबाहुल्याने न होणारे ध्यानसुद्धां साक्षात् श्रीपादांच्या निवासाने विघ्नरहित होते. अशा रीतीने ध्यानयोग सिद्ध झाला की विनासायास मोक्ष लाभतो. केवळ ज्ञानानेच होणारा मोक्ष, ईश्वराच्या कृपेने ज्ञानाची साधने अनुकूल झाल्याने विनाप्रतिबंध ज्ञानलाभ या क्षेत्रांतून होतो असा भावार्थ आहे.४९. इतरही कोणत्याही स्थानी जे कुणी श्रीपादांच्या चरणकमलांचे स्मरणसुद्धां करतात त्यांचेही ईप्सित मनोरथ ते शीघ्र पुरवितात.५०.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सातवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अष्टमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। अथ अष्टमोऽध्यायः।**

**आठव्या अध्यायी थोर। कथिला नरहरी अवतार। दाउनी बाललीला विचित्र। घेई संन्यासाश्रम पवित्र।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**ब्रह्मन् कुत्रावऽतीर्यासौ किं चकारास्य चेष्टितम् । मायाश्रितस्याप्रमेयं ब्रूहि शुश्रूषवेऽर्थदम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच।।**

**उदग्देशेऽवतीर्णस्य दीनानुद्धर्तुमीशितुः । वक्ष्येऽल्पकं साधुयोगि-दुर्विभाव्यं हि चेष्टितम् ।।२।।**
**या श्रीपादोपदेशेन प्रदोषेऽजमतोषयत् । सा प्रेत्योत्तरदेशे स्त्रीर्जाता ब्रह्मकुलेऽमले ।।३।।**

नामधारक उवाच, (हे) ब्रह्मन्, असौ कुत्र अवतीर्य किं चकार? अस्य माया+आश्रितस्य अप्रमेयं अर्थदं चेष्टितं शुश्रूषवे (मे) ब्रूहि।१। दीनान् उद्धर्तुं उदक् देशे अवतीर्णस्य ईशस्य चेष्टितं अहं अल्पकं वक्ष्ये। (तत्) हि साधु+योगि+दुर्विभाव्यं (अस्ति)।२। या (ब्राह्मणी) श्रीपाद+उपदेशेन प्रदोषे अजं अतोषयत्, सा प्रेत्य उत्तर+देशे अमले ब्रह्म+कुले स्त्रीः जाता।३।

श्रीगुरू भगवंतांच्या दुसऱ्या अवताराविषयी नामधारक प्रश्न करीत आहे. हे द्विजश्रेष्ठा, त्या भगवंतांनी कुठे अवतार घेतला आणि काय लीला केल्या? स्वेच्छेने मायेचा अंगीकार केलेल्या श्रीगुरूंच्या अचिंत्य पण अभीष्टार्थप्रद अशा चरित्राचे श्रवण करण्यास अत्सुक अशा मला आपण सांगा.१. सिद्धमुनी सूत्ररूपाने सांगतात, दीनजनांचा उद्धार करण्यासाठी उत्तरेच्या देशांत (वऱ्हाडांतील कारंजा येथे) अवतरलेल्या प्रभूंचे चरित्र मी किंचिन्मात्र सांगतो; कारण खरोखर त्यांच्या लीला साधूंना आणि योग्यांनासुद्धा आकळण्यास कठीण आहेत.२. (सातव्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे) ज्या ब्राह्मणीने श्रीपादश्रीवल्लभांच्या उपदेशानुसार प्रदोषकाली शिवाची आराधना करून प्रसन्न केले, ती मृत्यू पावल्यानंतर उत्तरेच्या (वऱ्हाड) प्रांतात (कारंजा गांवांत) पवित्र अशा (वैदिक) ब्राह्मण कुळांत स्त्री म्हणून जन्माला आली.३.

**धीरूपशीललक्ष्माढ्या सुसंस्कारा गुणान्विता । श्रीपादेन पुराम्बेति प्रोक्तत्वात्सा तदाह्वया ॥४॥**
**शिववृत्तिं माधवाख्यमनुरूपं द्विजं पिता । दृष्ट्वा तत्रैव तां तस्मै गृह्योक्तविधिना ददौ ॥५॥**
**सा पातिव्रत्यमास्थाय भेजे छायेव तं पतिम् । प्रदोषेऽपि शिवं पूर्व-संस्कारात् पत्यनुज्ञया ॥६॥**
**स्नेहोऽन्योन्याश्रयो भाव-बन्धोऽभूच्चक्रवाकवत् । तयोर्हर्षितयोरेवं गर्भमम्बा वरं दधौ ॥७॥**

(सा) धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्या सुसंस्कारा गुण+अन्विता अभूत्। पुरा श्रीपादेन अम्बा इति प्रोक्तत्वात् तत् आह्वया (प्रसिद्धा अभूत्)।४। पिता तत्र एव शिव+वृत्तिं अनुरूपं माधव+आख्यं द्विजं दृष्ट्वा तां तस्मै गृह्य+उक्त+विधिना ददौ।५। सा तं पतिं पातिव्रत्यं आस्थाय छाया+इव भेजे। पूर्वसंस्कारात् पति+अनुज्ञया शिवं अपि प्रदोषे (भेजे)।६। तयोः चक्रवाकवत् अन्यः+अन्य+आश्रयः स्नेहः भावबन्धः अभूत्। एवं हर्षितयोः तयोः अम्बा वरं गर्भं दधौ।७।

ती सारासारविवेक करणारी बुद्धी, सुंदर रूप, उत्तम स्वभाव आणि सुलक्षणांनी युक्त होती. तिचे संस्कारही चांगलेच होते आणि ती शांती आदि गुणानी मंडित होती. पूर्वजन्मी श्रीपादमुनींनी ‘अम्बा’ असे संबोधल्याने ह्या जन्मांतही ती त्याच नांवाने ओळखली जाऊं लागली.४. तिथे - कारंजालाच तिच्या वडिलांनी एक तिला अनुरूप असा शिवभक्त, माधव नांवाचा ब्राह्मण पाहून आपल्या या कन्येचे त्याला यथाविधी दान केले.५. त्या अंबेने पातिव्रत्य धर्माला अनुसरून आपल्या पतीची सावलीसारखी सेवा केली. तसेच पूर्वजन्मांतील संस्काराच्या प्रभावाने पतीच्या आज्ञेने प्रदोषकाळांत शंकराची पूजाही करूं लागली. (स्त्रियांनी आपल्या मर्जीने कोणतेच व्रतवैकल्यादि करूं नयेत; पतीच्या आज्ञनेच करावेत असे शास्त्रशासन आहे.)६.

**धर्मानुकूल कामसुख अनिंद्य आहे.** त्या पतिपत्नींत एकमेकांवर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणे प्रेम जडले आणि त्या भावबंधांत ते दृढ बांधले गेले. त्यांच्या वैवाहिक सुखाची परिणती अंबेने श्रेष्ठ असा गर्भ धारण करण्यांत झाली. स्त्रीपुरुषांच्या एक-दुसऱ्याच्या अवयवांच्या संयोगांतून निर्माण होणारा रतिरूप आनंद वेदांनीच प्रतिपादलेला आहे. ‘(जीवात्मा) आपल्या प्रज्ञेने उपस्थाच्या माध्यमांतून कामसुख आणि प्रजोत्पादन प्राप्त करून घेतो.’ (कौषीतकी उ.३:६); तसेच तैत्तिरीय उपनिषदांतही ‘प्रजाजनन आणि रतिक्रीडा यांना उपस्थजन्य

**सा सुदोहदलक्ष्माथ तत्त्वज्ञानमुपादिशत् । द्विजोप्यनुक्रमाच्चक्रे क्रियाः पुंसवनादिकाः ।।८।।**
**अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्व-प्रव्रज्यके सुसमयेऽथ समोष्णशीते ।**
**आत्मीयवाच्यपठनेन सतोऽनुगृह्णन्नोङ्कारवाच्यभगवान्स्वयमाविरासीत् ।।९।।**

अथ सुदोहद+लक्ष्मा सा तत्त्वज्ञानम् उपादिशत्। द्विजः अपि पुंसवनादिका क्रियाः अनुक्रमात् चक्रे।८। अ+ब्रध्न(अस्त)+ग+इष्ट+खग+सूचित+सिद्धि+पूर्व+प्रव्रज्यके सम+उष्ण+शीते सुसमये, आत्मीय+वाच्य+पठनेन सतोः अनुगृह्णन् कार+वाच्य भगवान् स्वयं आविरासीत्।९।

आनंद' अशा शब्दांत रतिसुखाला ब्रह्मानंदाचे स्वरूप मानले आहे. भगवद्गीतेनेही धर्माच्या अनुकूल कामाची भगवद् विभूतीत गणना केली आहे. अर्थातच हा काम निंद्य नाही. दधौ या शब्दांतून यथाविधी गर्भाधान या मंत्रोक्त विधीचा संकेत दिला आहे. ही सर्व भक्तपराधीन भगवंताची लीलाच होय.७.

यथाकाल तिला (अंबेला) उत्तम डोहाळे लागले. येणाऱ्या लोकांना ती तत्त्वज्ञानाचा उपदेश करूं लागली. माधवभटजींनीही क्रमशः तिसऱ्या महिन्यांत पुंसवन, अनवलोभन, चौथ्या महिन्यांत सीमंतोन्नयन (आश्वलायन गृह्यसूत्रानुसार) हे संस्कार पार पाडले. पारस्कर गृह्यसूत्रांत सीमंत सहाव्या वा आठव्या महिन्यांत सांगितले आहेत.८. ऋग्वेदाच्या *'दशमे मासि जायत'* या मंत्रानुसार दहाव्या महिन्यांत अंबा प्रसूत झाली. त्या वेळी कोणत्याही ग्रहाचा अस्त नव्हता. (**अब्रघ्नग** = अनस्तंगत) सर्व ग्रह अनुकूल होते आणि सिद्धिपूर्वक संन्यासाचा संकेत देणाऱ्या **प्रव्रज्या** नांवाच्या योगाने युक्त अशा शुभ मुहूर्तावर उष्णता आणि शीत यांचे साम्य असतांना भगवान् स्वतः, आपला वाचक जो प्रणव (ॐकार) त्याचा उच्चार करीत, कलीने त्रस्त असलेल्या साधुजनांवर अनुग्रह करण्यासाठी अवतरले. पतंजलींनी प्रणवाला ईश्वराचा वाचक असे म्हटले आहे (१:२७). कठोपनिषदानुसार (१:२:१७) ॐकार हेच परब्रह्माचे परमश्रेष्ठ आलंबन आहे. ह्या आलंबनाला जाणणारा जे इच्छील ते पावतो.

**विश्वं तदाभूच्छुभशंसि लोका ॐकारमाकर्ण्य सुविस्मिताः स्युः ।**
**भावान्सुखेटान्गणकाः सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुरदृष्टपूर्वान् ।।१०।।**

तदा विश्वं शुभ+शंसि अभूत्। लोकाः ॐकारं आकर्ण्य सुविस्मिताः स्युः। गणकाः अदृष्टपूर्वान् भावान् सुखेटान्, सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुः।१०।

ॐकार हे परात्परब्रह्मच असल्याने, तसेच ब्रह्माचे प्रतीक असल्याने आणि ब्रह्मप्राप्तीच्या सर्व उपायांत श्रेष्ठतम आलंबन (ध्येय) असल्याने भगवंत ॐकारवाच्य आहे. जशी एखादी व्यक्ती आपल्याला प्रिय अशा नांवाने हांक मारल्यानंतर आनंदित होते आणि जवळ येते तसाच परमात्माही आपल्याला प्रिय अशा ॐकाराच्या उच्चाराने प्रसन्न होऊन भक्ताकडे येतो.

**भगवदावतार.** भगवान स्वेच्छेने अवतरले (**स्वयं आविरासीत्**) म्हणजे आपल्यासारखे कर्मरूपी पारतंत्र्याने, शुभाशुभ कर्मांनुसार भौतिक देह धारण करून जन्मले नाहीत. तर श्रीकृष्णादि अवतारांच्या वेळी जसे ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य, तेज आदि ईश्वरी गुणांनी नित्य संपन्न, आपल्या त्रिगुणात्मकी वैष्णवी मायेला वश करून, जन्मादि विकारांनी अस्पृष्ट, अव्यय असा सर्वभूतमहेश्वर असूनसुद्धां, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावानेच आपल्याच मायेने देहधाऱ्यासारखा जन्मल्याचे नाटक करीत, लोकांवर अनुग्रह करण्यासाठी प्रकट झाले. तसेच या वेळी पण आपले असे कांही प्रयोजन नसतांनाही केवळ लोकोद्धारासाठीच, वैदिक धर्माचा उपदेश करण्यासाठीच नरसिंहसरस्वतीरूपाने प्रकटले. राम आणि कृष्ण यांच्या अवताराच्या वेळी जसे त्यांनी आपल्या दिव्य जन्माची सूचना देण्यासाठी आपला अलंकार, चिह्ने आणि आयुधे धारण केलेला सोळा वर्षांचा देह प्रकट केला त्याचप्रमाणे यावेळीही जन्मानंतर रडण्याऐवजी जन्मतःच ॐकाराचा पाठ केला.९.

त्या जन्मकाळी, अग्नी, वायू इत्यादि सर्व विश्व शुभाचे संकेत देत असल्याचे जाणवले. उपस्थित लोक बालकाचे ॐकारपठण ऐकून आश्चर्यचकित झाले. ज्योतिषांना बाळाच्या कुंडलीतील पूर्वी न पाहिलेले शुभ ग्रह, तनु आदि भाव आणि प्रव्रज्यादि योग पाहून परम हर्ष झाला.१०.

**त ऊचुर्माधवेदं ते सुकृतद्रुफलं किल । श्रीसिद्धयोऽस्य दास्योऽङ्घ्री स्पर्शवन्निधयोऽनुगाः ।।११।।**
**नायं गृही जनोद्धर्ता दृष्ट्या पतितपावनः । वन्द्योऽस्यानुग्रहात्कोऽपि भवेन्नैवात्र संशयः ।।१२।।**
**इत्युक्त्वा तेन हृष्टेन पूजितास्ते गृहं ययुः । श्रुत्वाद्भुतं जनुर्द्रष्टुं प्राप्तैर्लोकैः स नेक्षितः ।।१३।।**
**तद्दृग्दोषभियैकान्ते गुरुः संस्थाप्य रक्षया । तं ररक्षार्भबुद्ध्येशं तन्मायामोहितो हरिम् ।।१४।।**
**भूयान्नरो हरिरिव नरतापाघदैन्यहृत् । अयमित्याख्यया चक्रे बालं नरहरिं द्विजः।।१५।।**

ते ऊचुः, '(हे) माधव इदं किल ते सुकृत+द्रु+फलम्। अस्य श्री+सिद्धयोः दास्यः, अङ्घ्री स्पर्शवत्, निधयः अनुगाः (सन्ति)।११। अयं गृही न (अस्ति)। जन+उद्धर्ता, दृष्ट्या पतित पावनः अस्ति। अस्य अनुग्रहात् कः अपि वन्द्यः भवेत्। अत्र न एव संशयः।'१२। इति उक्त्वा हृष्टेन तेन पूजिताः ते (गणकाः) गृहं ययुः। (इदं) अद्भुतं जनुं श्रुत्वा द्रष्टुं प्राप्तैः लोकैः स न ईक्षितः।१३। तत्+माया+मोहितः गुरुः तत्+दृक्+दोष+भिया तं हरिं अर्भ+बुद्ध्या रक्षया संस्थाप्य ररक्ष।१४। अयं नरः हरिः इव नर+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात् इति (हेतोः) बालं आख्यया नरहरिं चक्रे।१५।

ते ज्योतिषी माधवाला म्हणाले, अरे माधवा, हा बालक म्हणजे खरोखर तुझ्या पुण्यवृक्षाचे फळच आहे! साक्षात् लक्ष्मी आणि सर्व सिद्धी याच्या दासी आहेत. याचे पाय परीसच आहेत. नऊ निधि यांचे अनुचर आहेत.११. हा गृहस्थ होणार नाही. लोकांचा उद्धारकर्ता होईल. आपल्या दृष्टीनेच पतितांनाही पावन करील. आपल्या अनुग्रहाने हा कुणालाही पूज्यता प्राप्त करून देईल याविषयी मुळीच संशय नाही.'१२. असे जातक ऐकून आनंदित झालेल्या माधवाने त्या ज्योतिष्यांची यथायोग्य संभावना केली आणि ते आपापल्या घरी निघून गेले. ह्या नवलाईच्या जन्माचे वृत्त ऐकून त्या बाळाला पाहायला आलेल्या लोकांना मात्र त्याला पाहतां आले नाही.१३. त्या हरीच्या मायेने मोहित झालेल्या पित्याने त्याला सामान्य बालकच समजून त्या लोकांची दृष्ट लागेल या भीतीने त्याला अंगारा लावून घरांत सुरक्षित ठेवून दिले.१४. हा मानवी बालक श्रीहरीसारखा लोकांचे ताप, पाप आणि दैन्य दूर करणारा होवो (होईल) अशा हेतूने त्याचे नांव नरहरी असे ठेवण्यांत आले.१५.

**क्षुच्छान्तिर्नास्य मत्तोऽतो धात्री वाजा पयस्विनी । मृग्येत्युक्तेऽम्बयोरोजौ स्पृष्ट्वार्भोऽध्यदुहत्पयः ।।१६।।**
**तद्बालचेष्टितं चित्रं सद्दृग्दोषभियानया । स्फुटं नाकारि मात्रैवमन्यदप्यद्भुतास्पदम् ।।१७।।**
**बाल्यादिना मर्त्यलिङ्ग-भाजीहाज्ञानलक्ष्मणाम् । प्रतीतेर्ब्रह्मतारोपः साक्षात्कैः कल्प्यते कथम् ।।१८।।**
**जातस्त्रैवार्षिकोऽप्येष लीलयाभूत्सुमूकवत् । खिन्नाऽतस्तत्प्रतीकारानारेभेऽम्बा द्विजोदितान् ।।१९।।**
**सौर्येऽह्न्यश्वत्थपत्रेऽन्न-भोजनैः कुलपार्चनैः । बालोक्तिपाठनैश्चान्यैः सूपायैर्नावदच्छिशुः ।।२०।।**

अस्य क्षुत्+शांतिः मत्तो न भवति अतो धात्री वा पयस्विनी अजा मृग्या इति अम्बया उक्ते उरोजौ स्पृष्ट्वा पयः अधि+अदुहत्।१६। तत् चित्रं बाल+चेष्टितं अनया मात्रा सत्+दृक्+दोष+भिया स्फुटं न+अकारि। एवं अन्यत् अपि अद्भुतास्पदं (स्फुटं न अकारि)।१७। इह मर्त्य+लिङ्ग+भाजि बाल्यादिना अज्ञान+लक्ष्मणाम् प्रतीतेः साक्षात् ब्रह्मता+आरोपः कैः कथं कल्प्यते?।१८। एषः त्रैवार्षिकः जाता अपि लीलया सु+मूक+वत् अभूत्। ततः खिन्ना अम्बा द्विज+उदितान् तत्+प्रतीकारान् आरेभे।१९। सौर्ये अह्नि अश्वत्थ+पत्रे अन्न+भोजनैः, कुल+प+अर्चनैः, बाल+उक्ति+पाठनैः, अन्यैः च सु+उपायैः शिशुः न अवदत्।२०।

'ह्या बाळाची भूक (माझे दूध कमी पडल्याने) माझ्याकडून शमत नाही. याच्यासाठी एखादी दुधाची आई किंवा एखादी दुभती शेळी शोधावी.' असे आपल्या आईचे बोलणे ऐकून त्या बाळाने आपल्या हातांनी तिच्या स्तनांना स्पर्श केला. त्याबरोबर तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा वाहूं लागल्या.१६. त्या लेकराने केलेला तो चमत्कार त्या मातेने साधूंचीही दृष्ट लागेल अशा भीतीने प्रकट केला नाही. त्या बाळाचे तसेच आणखीही चमत्कार तिने उघड केले नाहीत. यावरून भगवंताच्या लीला अनंत आहेत हेच सूचित केले आहे.१७. या भूलोकावर अवतरून बाल्य आदि मानवरूपाची चिह्ने धारण केलेल्या बाळाच्या अज्ञानाच्या लक्षणांचा प्रत्यय येत असतांना त्याच्याविषयी हा साक्षात् परब्रह्म आहे अशी कल्पना कुणाला कशी येऊं शकेल?१८. हा मुलगा तीन वर्षाचा होऊनही स्वेच्छेने कांहीही न बोलतां अगदी मुक्यासारखा झाला. त्यामुळे खिन्न झालेल्या आईने ब्राह्मणांना विचारून त्यावर उपाय सुरूं केले.१९. शनिवारी (किंवा रविवारी; **सौरि**=शनि; सूर्य=रवि) पिंपळाच्या पानांत अन्न वाढून जेवविण्याने, कुलस्वामीच्या पूजनाने, त्याच्याबरोबर बोबडे बोल बोलून शिकवल्याने आणि ब्राह्मीवचाचे सेवन आदि अशाच दुसऱ्या प्रभावी उपायांनीसुद्धां तो शिशु कांही बोललाच नाही.२०.

**वक्तुं श्रोतुं नायमज्ञो मूकश्चेत्कथमोङ्कृतिम् । श्रुत्वान्योक्तिं ब्रूत इति पितरौ मोहमापतुः ।।२१।।**
**मूकोऽयं नौ श्रमेणालं प्रदोषे शम्भुरर्चितः । दिष्ट्यैतत्फलं प्राप्तं संस्कार्योऽसौ कथं न्वतः ।।२२।।**
**ताभ्यामित्युदिते मौञ्ज्यां बद्धायां वक्ष्य इत्यसौ । संज्ञया दर्शयत्स्वर्णं व्यकृणोत्तन्मुदेऽयसः ।।२३।।**
**तदा सञ्जातविश्वासो विप्रानाहूय माधवः । मुदा संभृतसंभारः सुलग्नेऽमुमुपानयत् ।।२४।।**

अयम् वक्तुं श्रोतुं च न अज्ञः। मूक इति चेत् अन्य+उक्तिं श्रुत्वा कथं ॐ कृतिं ब्रूते? इति पितरौ मोहं आपतुः।२१। अयं मूकः (अस्ति)। नौ श्रमेण अलम्। प्रदोषे शम्भुः अर्चितः तत् एतत् दिष्ट्या फलं प्राप्तम्। नु अतः असौ कथं न संस्कार्यः?।२२। ताभ्यां इति उदिते असौ मौञ्जायां बद्धायां वक्ष्ये इति संज्ञया दर्शयत्। तत्+मुदे अयसः स्वर्णं व्यकृणोत्।२३। तदा सञ्जात+विश्वासः माधवः मुदा संभृत+संभारः विप्रान् आहूय सुलग्ने अमुम् उपानयत्।२४।

याला ऐकायला किंवा बोलायला येत नाही असे नाही. मुका म्हणावा तर इतरांचे बालणे ऐकून हा 'ॐ' असे उत्तर कसे देतो? असा त्याच्या मातापित्यांना संभ्रम पडला.२१. ते म्हणाले, 'इतके उपाय करूनही हा कांहीच बोलत नाही त्या अर्थी हा मुकाच असावा. प्रदोषकाळी शंकराची पूजा केल्याचे हे चांगले पुत्ररूप फळ आम्हांला मिळाले! तो दुर्दैवाने मुका मिघाला. तरी आतां त्याच्यावर मौंजीबंधनादि संस्कार न करून कसे चालेल?'२२. आपल्या आईवडिलांचे हे संभाषण ऐकून ह्या मुलाने त्यांना खुणेने दाखविले कीं, 'मी मौञ्जीबंधनानंतर बोलेन.' त्यांची खात्री पटविण्यासाठी त्यानें आपल्या हस्तस्पर्शानिच परीसाप्रमाणे लोखंडाचे सोने करून दाखविले. विधिवत् संस्कारून स्वस्तिवाचन केल्यावर बटूने मातृभोजन केले. २३. त्या वेळी माधवाचा विश्वास बसला आणि त्याने आनंदाने सर्व सामग्री जमवून शुभ मुहूर्तावर ब्राह्मणांना बोलावून ह्या आपल्या पुत्राची मुंज लावली. मुंज अर्थात् उपनयन म्हणजे आचार्यांजवळ नेणे हे अंगभूत असलेले आणि गायत्रीचा उपदेश प्रधान असलेले विशेष कर्म. उपनयन हे पद योगरूढ आहे. २४.

**सुसंस्कृतः कृतस्वस्त्ययनो भुक्तोऽम्बया सह । गुरूपदिष्टां सावित्रीमुपनीतोऽयमाददे ।।२५।।**
**गुर्वाश्रितब्रह्मचारि-धर्मो भिक्षां स मातरम । याचयित्वा जगौ वेदान्न चित्रं वेदवाच्यदः ।।२६।।**
**प्रणम्य पितरौ प्राह विरक्तः प्रव्रजामि भोः । अनित्याद्द्राक्शरीरस्य तदाज्ञां दातुमर्हथः ।।२७।।**

सु+संस्कृतः कृत+स्वस्ति+अयनः अम्बया सह भुक्तः उपनीतः गुरु+उपदिष्टां सावित्रीं आददे।२५। गुरु+आश्रित+ब्रह्मचारि+धर्मः सः मातरम् भिक्षां याचयित्वा वेदान् जगौ। (इदं) न चित्रं, अदः वेदवाचि।२६। पितरो प्रणम्य (सः) प्राह भोः! अहं विरक्तः शरीरस्य अनित्यत्वात् द्राक् प्रव्रजामि। तत् (युवां) आज्ञां दातुं अर्हथः।२७।

त्यानंतर मुंज लावून - द्वितीय जन्माचे द्योतक असलेली वस्त्र आणि जानवे घालून, गुरूंजवळ जाऊन त्यांनी कानांत उपदेशिलेला उपदेशः - अर्धा-अर्धा आणि संपूर्ण गायत्री मंत्र स्वीकारून उच्चारला.२५. ‘तूं आतां ब्रह्मचारी आहेस, दिवसां न झोपतां आचार्यांच्या अधीन राहून वेदांचे अध्ययन करावे, सकाळ-संध्याकाळ भिक्षा मागावी, सकाळ-संध्याकाळ समिधा आणाव्यात’ (आश्वलायन गृह्यसूत्र १:२२:२-५) इत्यादि ब्रह्मचारी धर्माचे गुरूंकडून श्रवण करून, आईजवळ त्याप्रमाणे भिक्षा मागितली आणि ऋक्, यजुः आणि साम या तीनही वेदांचे पठण केले. ऋग्वेदी ब्राह्मणांत वेदांचे प्रथम उपाकरण (वेदाध्ययनाचा आरंभ) उत्तरायणांत करण्याचा नियम असतो, तसा श्रीगुरूंनी अवतार घेतलेल्या वाजिसनेयि शाखेत नसतो. त्यामुळे उपनयनानंतर लगेच वेदपठण करणे योग्यच होय. नुकतीच मुंज झालेल्या, कसलाही अभ्यास न केलेल्या त्या बटूने वेदपठण केले यांत कांही आश्चर्य मानण्याचे कारणही नाही. कारण सर्व वेद ज्यांची निःश्वसिते आहेत अशा महद्भूताचा अवतार ते आहेत (बृहदारण्यक उपनिषद २:४:१०).२६. नंतर त्या बटूने माता-पित्यांना वंदन केले आणि म्हणाले, ‘मी विरक्त आहे. शरीर अनित्य आहे. त्याचा क्षणाचाही भरंवसा नाही. ते पडण्यापूर्वीच ज्ञान झाले तरच मोक्ष मिळतो. अन्यथा कठोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (२:३:४) पुनश्च जन्म घ्यावा लागतो. त्यासाठी मी लगेच शास्त्राच्या आज्ञेनुसार श्रवणादींच्या अनुष्ठानासाठी संन्यास घेत आहे. तरी आपण मला आज्ञा द्यावी.’२७.

**प्रत्यवायाभिक्रमान्तो नैव धीमति धीस्त्वियम । मम प्राग्दैहिकाक्षय्या भविष्यन्त्यात्मजा हि वाम् ।।२८।।**
**इत्युक्तेऽम्बा विषीदन्ती तन्मायामोहिताऽब्रवीत् । एक एव सुतस्त्वं मे कथं यासि विहाय माम ।।२९।।**
**प्रव्रजेद्वेदविद्भुक्त-गार्हस्थ्योऽनुक्रमाद्वनात् । तत्त्वविद्वासनानाश-मनोभङ्गा अतः श्रुताः ।।३०।।**

धीमति प्रत्यवाय+अभिक्रम+अन्तौ न एव। इयं मम धीः प्राक्+दैहिका अक्षय्या। वां आत्मजा भविष्यन्ति हि।२८। इति उक्ते तत्+माया+मोहिता अम्बा विषीदन्ती अब्रवीत्। त्वं मे एक एव सुतः। मां विहाय कथं यासि?२९। वेदवित् भुक्त+गार्हस्थ्यः अनुक्रमात् वनात् प्रव्रजेत्। अतः तत्त्ववित्+वासना+नाश+ मनो+भङ्गाः श्रुताः।३०।

आपल्या गृहत्यागाच्या प्रस्तावाला आईवडिलांचा विरोध असणार याची जाणीव असलेले बाल नरहरी पुढे म्हणाले, 'ब्रह्मचर्याश्रमांत स्वाध्यायाचे अध्ययन करावे (शतपथ ब्राह्मण ११:५:३) अशी वेदांची आणि ब्राह्मणाने संपूर्ण वेदांचे सरहस्य ज्ञान करून घ्यावे शास्त्रांचीही (मनुस्मृति २:१६५) आज्ञा आहे. स्वाध्यायाचा परित्याग करून ती आज्ञा पालन न केल्याने ऋषींच्या ऋणाची फेड न केल्याचा प्रत्यवाय दोष लागेल; तसेच वैराग्याच्या अभावी हा जो संन्यासाचा अभिक्रम (आरंभ) केला आहे त्याचाही नाश होईल. (बृहदारण्यक उपनिषदाच्या भाष्यावरील वार्तिकांत १:४:१५८४ म्हटल्याप्रमाणे) कलियुगांत बहुसंख्येने आढळणाऱ्या भरकटलेल्या, भांडकुदळ, दुश्चित्त, परनिंदापर संन्याशांत भर पडेल; असे तुम्हांला वाटूं देऊं नका. कारण मी विवेकशील बुद्धीने हा निर्णय घेत आहे. ही बुद्धी माझी पूर्वजन्मार्जित आणि अक्षय आहे. मी संन्यास घेतल्यावर तुमची गती काय असें विचाराल तर तुम्हांला आणखी पुत्र होणार आहेत.'२८. असे आपल्या मुलाचे भाषण ऐकून त्याच्याच मायेने भुललेली आई दुःखाने कळवळून म्हणाली. 'अरे, तूं माझा एकुलता एक मुलगा आहेस. असा कसा मला सोडून जातोस?२९. आधी ब्रह्मचर्याश्रमांत वेदांचा अभ्यास करावा, मग गृहस्थाश्रमांतील सुखांचा उपभोग घेऊन वानप्रस्थ आश्रम घ्यावा आणि मग संन्यास घेऊन तत्त्वज्ञान, वासनाक्षय आणि मनोभंग साधावेत असाच क्रम आमच्या ऐकण्यात आहे. किंवा असाच क्रम श्रुतिसंमत आहे.'३०.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**जैह्व्यौपस्थ्यसुखात्क्तानां क्रमोऽयं नैव मादृशः । प्राक्संस्कारविरक्तस्य जोष्यैः किं मेऽकयोनिभिः ।।३१।।**
**श्रुतश्रोतव्यनिर्वेदं यास्ये संन्यस्य भो ततः । संसिद्धिः सुलभा नातः परं कार्यं हि धीमता ।।३२।।**
**कलावायुः शतं स्वापाद्-ध्रियतेऽर्धं तु शेषकम् । बाल्ययौवनवृद्धत्वैः पराधीनतया च नुः ।।३३।।**

श्रीगुरुः उवाच। जैह्व्य+औपस्थ्य+सुखात्क्तानां अयं क्रमः। मादृशः न एव। प्राक्+संस्कार+विरक्तस्य मे अक+योनिभिः जोष्यैः किम्?३१। भो, संन्यस्य श्रुत+श्रोतव्य+निर्वेदं यास्ये। ततः सिद्धिः सुलभा हि अतः परं धीमता न कार्यम्।३२। कलौ नुः आयुः शतम्। अर्धं स्वापात् ध्रियते। शेषकं (अर्धं) तु बाल्य+यौवन+वृद्धत्वैः पराधीनतया (ध्रियते)।३३।

यावर श्रीगुरू उत्तर देत आहेत. 'जिह्वेने मिळणारा रसास्वाद आणि लिंगाने मिळणारे कामसुख (हे सर्वच ऐंद्रिय सुखांचे उपलक्षण आहे) यांची आसक्ती असणाऱ्यांसाठी हा तूं सांगितलेला क्रम आहे. माझ्यासारख्यासाठी नाही. पूर्वसंस्कारांमुळे विरक्त असलेल्या मला या दुःखमूलक विषयांचे काय प्रयोजन? या विषयांच्या उपभोगाच्या काळांतही स्पर्धा, असूयादि उपसर्ग असतातच. विवेकशील माणसाला सगळाच संसार दुःखरूपच आहे असे पतंजलींचे सूत्र आहे (*'सर्वमेव दुःखं विवेकिनाम्।'* २:१५) म्हणून संन्यास घेऊन ज्ञात आणि अज्ञात अशा सर्व अग्राह्य विषयांपासून मन काढून मी जात आहे. निर्वेद म्हणजे दुःखबुद्धीने विषयांसंबंधी उदासीनता. अशा रीतीने संन्यास घेतल्यावर मनुष्यजन्माचे परमसाध्य जो मोक्ष तो सुलभ होतो. म्हणून शहाण्याने यापेक्षां वेगळे कांही करूं नये.३२. 'कलियुगांत माणसाची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची सांगितली आहे. त्यांतील अर्धी झोपेतच जाते. उरलेल्या अर्ध्या भागांत बालपण, यौवन आणि वार्धक्य यांच्यांत अनुक्रमे मातापिता, पत्नी आणि पुत्रपौत्र (दुहिता-दौहित्र) यांच्या अधीनतेत जाते (*'पितृमातृमयो बाल्ये यौवने वनितामयः। पुत्रपौत्रमयो वाद्ध्र्ये मूढो नात्ममयः क्वचित्।।'* गरुडपुराण-प्रेतखंड-धर्मकांड १२:१९).३३.

**स्वप्नवत्सम्पदिष्टाढ्य-संसारोऽज्ञानकल्पितः । यौवनं पुष्प वच्चायुस्तडिद्वत् क्व धृतिर्बुधे ।।३४।।**
**कालो भ्रूणाञ्छिशून्यूनो वृद्धानार्तान्सुखस्थितान् । मूढान् ग्रसत्यपि प्राज्ञान्निःशेषानमरानपि ।।३५।।**
**यदर्थं ममताप्येतज्जलबुद्बुदवद्वपुः । मांसास्थिरक्तवद्धिंस्र-वञ्चनार्थं त्वगावृतम् ।।३६।।**

अज्ञानकल्पितः सम्पत्+इष्ट+आढ्य+संसारः स्वप्नवत् (अस्ति)। यौवनं पुष्पवत्; आयुः तडित्+वत्। बुधे क्व धृतिः?३४। कालः भ्रूणान्, शिशून्, यूनः, वृद्धान्, आर्तान्, सुखस्थितान्, मूढान्, प्राज्ञान् अपि निःशेषान् अमरान् अपि ग्रसति।३५। यदर्थं ममता (क्रियते) एतत् अपि वपुः जल+बुद्बुदवत्। मांस+अस्थि+रक्त+वत् हिंस्र+वंचनार्थं त्वक्+आवृतम्।३६।

अज्ञानाने भासणारा हा संपत्ती, आप्त, इष्ट इत्यादींनी युक्त असा संसार स्वप्नासारखा मिथ्या आहे. यौवन हे फुलासारखे लगेच कोमेजणारे आहे. आकाशांत चमकून जाणाऱ्या विजेसारखे हे आयुष्य क्षणभंगुर आहे. शहाण्याने यांतील कशाचा भरंवसा धरावा? हे मानवी जीवन बिनभरंवशाचे आहे असा भावार्थ.३४. इथे काळ (मृत्यू) गर्भांतल्या भ्रूणापासून सर्वांच्या मागे लागलेला आहे. बाल, तरुण, वृद्ध, दुःखी, सुखी, मूर्ख, शहाणा या सर्वांचा, अगदी देवांचाही तो ग्रास करतोच. कुणालाही सोडत नाही.३५.

**नाशिवंत देह -** ज्या देहामुळे सर्व 'माझे' वाटतात तो देहसुद्धां पाण्यावरील बुडबुड्यासारखा अशाश्वत आहे. मांस, अस्थी, रक्त अशा घृणास्पद पदार्थांचा बनलेला आणि लांडगे, कोल्हे, कावळे अशा हिंस्र प्राण्यांपासून रक्षण करण्यासाठी कातडीत गुंडाळलेला आहे. शतश्लोकींत (४) भ.पू.पा. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे बाहेरून हाडे, स्नायू, मज्जा, मांस, रक्त, चरबी आणि त्वचा यांनी घडलेला आणि आंत विष्ठा, मूत्र आणि श्लेष्म यांनी भरलेला असा हा किळसवाणा देह धारण करण्याइतके वैराग्याला प्रभावी निमित्त शोधून सांपडणार नाही.३६.

**न भस्मविट्कीटरूप-परिणामं निजानुगम् । तदानुषङ्गिकाः स्त्र्याद्याः किमुतानर्थहेतवः ।।३७।।**

भस्म+विट्+कीट+रूप+परिणामं (वपुः) न निज+अनुगम्। तत्+आनुषंगिकाः अनर्थ+हेतवाः स्त्री+आद्याः किम् उत?३७।
गरुडपुराणाच्या वचनानुसार (प्रेतखंड-धर्मकांड १९:१८) मरणोत्तर ह्या शरीराचे, पुरले तर कृमी, जाळले तर भस्म आणि हिंस्र प्राणांनी खाल्ले तर विष्ठा अशा रूपांत परिवर्तन होते. हे कांही आपल्याबरोबर लोकांतरी किंवा जन्मांतरी येत नाही. गरुडपुराणांतच (प्रेतखंड-धर्मकांड १२:२४-२७) पुढे असे म्हटले आहे की जीवाने शरीर सोडल्यानंतर ते भूमीवर दगडा-लाकडासारखे अचेतन होऊन तिथेच पडते; हा जीव आपण केलेले शुभाशुभ कर्म तेवढे बरोबर घेऊन जातो. मित्र आणि भाऊबंद स्मशानापर्यंत येऊन परत जातात आणि शरीराला अग्नी जाळून टाकतो. जाणाऱ्या जीवासोबत फक्त त्याने केलेले पाप-पुण्यच जाते. ही जर देहाची कथा आहे तर देहाच्या अनुषंगाने आपले वाटणाऱ्या, अनर्थालाच कारण असणाऱ्या स्त्रीपुत्रादीविषयी बोलायलाच नको!३७.

**देह आणि जीव -** हा देह पंचभूतांचा घडलेला, विकारशील (जन्म, वाढ, अस्तित्व, परिणाम, क्षय आणि नाश हे विकार असलेला) आणि इंद्रियांना प्रतीत होणारा - म्हणजेच घटासारखा जड आहे. जीव हा गीतेच्या वचनानुसार (१५:१७) चैतन्याचा अंश आहे; अविनाशी आहे; तो आकाशासारखा सर्वव्यापी आहे; आकाश जसे घट-मठादि उपाधींनी बंदिस्त झाल्यासारखे भासते पण तसे नसते, तसाच देहादि उपाधींनी बद्ध वाटणारा जीव वस्तुतः तसा नसतो. कठोपनिषदाच्या वचनानुसार (१:२:१८) जन्मादिविकाररहित आहे. मग तो संसारांत पडून सुखदुःखांचा भोग कसा घेतो, असे कुणी म्हणेल, तर त्याचे उत्तर असे आहे की त्याचा सुखदुःखाशी जाणवणारा संबंध अज्ञानमूलक आणि स्वप्नवत् आहे. 'तु' शब्दातून छांदोग्य उपनिषदांतील (६:३:२) जीवरूपाने प्राणिमात्रांत प्रवेशून नामरूपांची अभिव्यक्ती करण्याच्या ईश्वरी संकल्पाचा संकेत आहे. आतां अशी शंका उपस्थित होते की सर्वज्ञ ईश्वर जाणूनबुजून लक्षावधी अनर्थांचे मूळ असलेल्या देहांत प्रवेश करून दुःख भोगण्याचा संकल्प कसा करील?

**देहोऽचित्सर्वगो जीवश्चिदंशोऽजोऽव्ययो ध्रुवः । स्वप्नवत्सुखदुःखादि-संबन्धोऽज्ञानजोऽस्य तु ।।३८।।**

देहः अचित्। चिदंशः जीवः अजः अव्ययः। अस्य सुख+दुःख+आदि संबंधः तु अज्ञान+जः स्वप्न+वत्।३८।

शंका बरोबर आहे. आपल्या अविकृत रूपाने अनुप्रवेश करून दुःख भोगीन असा ईश्वराचा संकल्प नाही. जीव हा बुद्धी, मन, प्राण, इंद्रिये इत्यादि उपाधींत पडलेले केवळ ईश्वराचे प्रतिबंब आहे. आरशांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासारखे. अचिंत्य अनंतशक्तिमान आत्म्याचा बुद्ध्यादिकांत होणारा फक्त आभास आहे. आत्मस्वरूपाचा विवेक न केल्याने तो सुखी, दुःखी, मूढ इत्यादि भासतो. जसे आरशांत पडलेले माणसाचे किंवा पाण्यांत पडलेले सूर्याचे प्रतिबिंब आरशावरील मळाने मळल्यासारखे वाटते, आरशावरील तड्याने फुटल्यासारखे दिसते किंवा पाण्याच्या हलण्यामुळे विकृत झालेले दिसते तसेच हे आहे. मूळ बिंब - माणूस किंवा सूर्य, यांच्यावर त्याचा कांहीच परिणाम होत नाही. कठोपनिषदाच्या (२:२:११) प्रतिपादनानुसार सर्व जगाचा नेत्र असलेला सूर्य जसा त्या जगांतील दोषांनी दूषित होत नाही त्याचप्रमाणे भूतमात्रांचा अंतर्यामी बाह्य जगतांतील दुःखांपासून अलिप्त असतो. बृहदारण्यक उपनिषदांत (१:३:७) म्हटलेच आहे की हा आत्मा चिंतन करीत असल्यासारखा किंवा हालचाल करीत असल्यासारखा दिसतो. वस्तुतः चिंतन वा हालचाल हे त्याचे गुण नसतात.

**जीवाचे सत्यत्व -** मृत्तिकेची बाहुली, मृत्तिकेचा घट, मृत्तिकेचे पात्र या सर्वांत मृत्तिका हेच सत्य आहे. घट, पात्र, बाहुली इत्यादि मृत्तिकेचेच विकार आहेत. त्या विकारांना शब्दांत व्यक्त करण्यासाठी नांवे दिलेली आहेत (छांदोग्य उपनिषद ६:१:४). त्याचप्रमाणे आत्माच सत्य आहे आणि सर्व जीव हे विकार आहेत असे मानले तर मग सगळे जीव लटकेच म्हणावे लागतील आणि इहलोक, परलोक इत्यादीसुद्धां खोटे ठरतील. हा आक्षेप बरोबर नाही; कारण आत्मा सत्य आहे आणि त्याच्या अधिष्ठानामुळे जीवादि विकारांनाही सत्यत्व येते. आत्म्याचे अधिष्ठान नसेल तर ते आपल्या ठिकाणी असत्यच आहेत. सद्रूप आत्म्यामुळे सर्व व्यवहारांना सर्व विकारांना सत्यत्व आहे. अन्यथा ते खोटेच आहेत. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांच्या छांदोग्य उपनिषदाच्या ६:३:२ या मंत्रावरील भाष्याचा आधार घेतला आहे.३८.

**प्रसादात्सद्गुरोः शाब्द-परब्रह्मविदस्त्विदम् । छित्त्वाऽविद्गहनं ज्ञेय-ज्ञानास्त्रः स्वस्थ इद्भवेत् ।।३९।।**
**य उत्तमं ज्ञानपात्रं लब्ध्वा धामाग्रजातिजम् । नाचरत्यात्मनः श्रेयस्तेनात्मा वञ्चितो ध्रुवम् ।।४०।।**
**तस्मान्नारब्धविघ्ना मे भव तेऽम्ब नमोऽपि ते । पुत्रो भविष्यति ध्यानाद् भवाब्धिं मे तरिष्यसि ।।४१।।**

शाब्द+परब्रह्म+विदः सद्गुरोः प्रसादात् ज्ञेय+ज्ञान+अस्त्रः इत् इदं तु अवित्+गहनं छित्त्वा स्वस्थः भवेत्।३९। यः उत्तमं ज्ञान+पात्रं अग्र+जातिजं धाम लब्ध्वा आत्मनः श्रेयं न आचरति, तेन आत्मा ध्रुवं वंचितम्।४०। हे अम्ब! तस्मात् मे आरब्ध+विघ्ना न भव। ते नमः। अपि ते पुत्रो भविष्यति। मे ध्यानात् भवं तरिष्यसि।४१।

**सद्गुरूंची आवश्यकता -** जीवाचा सुखदुःखाशी असलेला संबंध अज्ञानजन्य आहे तर मग ह्या अज्ञानाचा परिहार कशाने होईल ज्यायोगे पुरुष कृतार्थ होतो? आत्म्याविषयीचे औपनिषद शब्दज्ञान तसेच परब्रह्माशी एकरूप होऊन झालेले विज्ञान ज्याला झाले आहे अशा म्हणजे श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंच्या प्रसादाने म्हणजेच श्रवणादि उपदेशाने हे अज्ञान दूर होते. आचार्यवान् म्हणजे गुरू असलेल्या पुरुषाला ज्ञान होते असे छांदोग्य उपनिषदाचे (६:१४:२) प्रतिपादन आहे. यावर कुणी असे म्हणेल की पद, वाक्य, प्रमाण यांचे ज्ञान असलेला कुणीही हे उपनिषदांतील शब्दज्ञान स्वतःच्या विचाराने प्राप्त करूं शकतो. तिथे सद्गुरूंचे काय प्रयोजन? याचे कारण असे आहे की हातांत समिधा धारण करून श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जाऊन ज्ञान मिळविण्याचाच, वेदांनी उपदेश (मुंडक उ. १:२:१२) केला आहे. छांदोग्यांतील (६:१४:२) दृष्टांताप्रमाणे गंधार देशाचा रहिवासी चोरांनी डोळ्यांवर पट्टी लावून बांधून ठेवल्यांने विवेकहीन आणि दिङ्मूढ होतो; तहानभुकेने व्याकुळ होतो; अरण्यांतील हिंस्र पशु, वाटमारे इत्यादि अनेक अनर्थांच्या भीतीने अर्धमेला होतो. त्यां वेळी त्याला स्वतःला आक्रोशाशिवाय कांहीच करतां येत नाही. असा तो दुःखार्त आणि अगतिक 'कुणी तरी येऊन आपली यांतून सुटका करावी' अशी तळमळ करीत उभा असतो. अशा वेळी कुणी तरी दयाळू माणूस येऊन त्याला बंधनांतून सोडवून त्याचे डोळे उघडतो. मग त्यानं सांगितलेल्या गंधार देशाच्या वाटेने जाऊन आपल्या घरी जाऊन सुटकेचा निःश्वास टाकून सुखी होते.

**इत्युक्त्वाऽदर्शयत्तस्यै स्वं रूपं दिव्यमुत्तमम् । साप्यदभ्रदृशा दृष्ट्वा तद्वित्तत्प्राग्जनिर्जगौ ।।४२।।**
**नमस्ते भगवन्देव प्राग्दृष्टो मर्तुकामया । कुपुत्रया मया स त्वं श्रीपादो मेऽद्य गोचरः ।।४३।।**

इति उक्त्वा तस्यै स्वं दिव्यं उत्तमं रूपं अदर्शयत्। सा अपि अदभ्र+दृशा दृष्ट्वा तत्+वित् तत्+प्राक्+जनिः जगौ।४२। (हे) देव! भगवन्! नमस्ते! प्राक् मया कुपुत्रया मर्तुकामया दृष्टः (यः) श्रीपादः सः त्वं अद्य मे गोचरः।४३।

त्याचप्रमाणे सच्चिदानंद जगदात्मनाच्या आपल्या नित्य स्वरूपापासून भ्रष्ट झालेला हा जीवात्मा आकाश, तेज आदि महाभूतांपासून झालेल्या आणि वात, पित्त, कफ, रक्त, मांस, रुधिर, मेद, मज्जा, शुक्र, कृमी, मल-मूत्र यांनी व्याप्त अशा या देहरूपी अरण्यांत शीत-ऊष्ण अशा अनेक द्वंद्वांच्या दुःखांनी गांजलेला, विवेकरूपी डोळ्यांवर मोह नांवाची पट्टी बंधल्याने अंध झालेला, पत्नी, पुत्र, बंधू, पशू अशा अनेक विषयांच्या तृष्णारूपी पाशाने बद्ध असलेला, पापपुण्यरूपी चोरांच्या तावडीत सांपडून, 'मी हा अमुक', 'हे माझे पुत्र', 'हे माझे बांधव', 'मी सुखी आहे', 'मी दुःखी आहे', 'मी मूर्ख', 'मी पंडित', 'मी जन्मलो', 'मी मेलो', 'मी म्हातारा', 'मी पापी', 'माझा मुलगा मेला', 'माझे धन गेले', 'माझा घात झाला', 'आतां मी कसा जगूं?', 'माझी काय गती?', 'मला कोण वांचवील?' अशा सहस्रावधी अनर्थांच्या जाळ्यांत सांपडलेल्या जीवाला कांही पूर्वपुण्याईमुळे, परमकृपाळू, शब्दज्ञानाने व्युत्पन्न आणि परब्रह्माच्या साक्षात्कारी जीवन्मुक्त सद्गुरूंची भेट होते. त्यांनी परमकारुण्याने संसारांतील दोष दाखवून दिल्याने तो पुरुष विरक्त होतो. मग ते दयाघन सद्गुरु त्याला 'तूं अमका, पुत्रादि युक्त संसारी नाहीस तर ते (ब्रह्म) तूं आहेस' असा उपदेश करून अविद्यारूपी मोहाची पट्टी सोडून त्याचे विवेकरूपी नेत्र उघडतात. त्यासाठी गीतेत निरूपिलेले जे **ज्ञेय** (१३:१२) अनादिमान् परब्रह्म आणि त्याच्या प्राप्तीची अमानित्वादि अठरा **ज्ञान**साधने ही **अस्त्रे** त्याला सद्गुरूंकडूनच मिळतात. त्यांनी गाढ अविद्येचा छेद करून तो स्वस्थ- आत्मस्वरूपांत स्थिर, होतो.३९. जो हा आत्मज्ञानाला योग्य असा ब्राह्मण देह मिळूनही आत्मकल्याणाचे साधन करीत नाही तो स्वतःची मोठीच फसवणूक करून घेतो.४०.

**ब्रह्मापि वेत्ति नो रूप-गुणांस्तु मोहिता त्वहम् । मानुषी त्वां कथं जाने दिष्ट्याद्य ज्ञानमर्पितम् ।।४४।।**
**कृतं मत्कुक्षिसंभूत इति लोकविडम्बनम् । अज ब्रह्माण्डकुक्षे न उभयं पावितं कुलम् ।।४५।।**

(तव) रूप+गुणान् तु ब्रह्मा+अपि नो वेत्ति। अहं तु मोहिता मानुषी त्वां कथं जाने? दिष्ट्या अद्य ज्ञानं अर्पितम्।४४। (हे) अज! ब्रह्मांडकुक्षे! मत्+कुक्षि+संभूत इति लोक+विडंबनं कृतम्। नः उभयं कुलं पावितम्।४५।

आई! तेवढ्यासाठी माझ्या ह्या उपक्रमाला अडसर होऊं नकोस. मी तुला नमस्कार करतो. आणि तुला आणखी मुलगा होईल. तसेच माझ्या ध्यानाने तूं हा भवसागर तरून जाशील.४१. असे बोलून श्रीगुरूंनी तिला (मातेला) आपले दिव्य परमश्रेष्ठ रूप दाखविले. तीसुद्धां ते रूप जाणून - पूर्वजन्मी आपल्याला वर देणाऱ्या भगवान श्रीपादवल्लभांना ओळखून म्हणाली.४२. 'देवा, भगवंता! आपल्याला नमस्कार असो.४३. पूर्वजन्मी मी मूढ पुत्राच्या दुःखाने त्रासून आत्महत्या करीत असतांना मला दर्शन देणारे श्रीपादच आपण आज मला आपल्या दर्शनाने कृतार्थ करीत आहांत. मी असा आहे हे तुला आधीपासूनच (माझ्या जन्मापासूनच) कसे कळाले नाही? असे विचारशील तर तुझे रूप आणि गुण साक्षात् ब्रह्मदेवालाही कळत नाहीत. मी तर तुझ्या मायेने मोहित झालेली एक सामान्य स्त्री आहे. माझ्या परमभाग्याने आज मला हे (तुझ्या रूपगुणांचे) ज्ञान अर्पण केले आहेस.४४.' 'असा जर मी आहे तर तुझा मुलगा कसा झालो?' असा प्रश्न अपेक्षून ती माता म्हणते आहे. 'हे जन्म-मरणादिविकारांच्या अतीत असणाऱ्या आणि असंख्य ब्रह्मांडे आपल्या कुशींत धारण करणाऱ्या देवा! माझ्या कुशीतून जन्म घेण्याचे हे आपण लोकांना दाखविलेले एक नाटक मात्र आहे. ह्यामुळे आमची उभय कुळे पावन झाली आहेत.'४५.

**सत्यसङ्कल्प ते विघ्नं माऽस्तु रूपं स्थिरीकुरु । मयीदं चात्र भो स्थेयं यावत्पुत्रो भविष्यति ।।४६।।**
**तथेत्युक्त्वेशबुद्ध्याऽसौ स्थित्वा ताभ्यां सुपूजितः । तत्र शिक्षितवाञ्छिष्यान्विदुषोऽप्येष वेदवाक् ।।४७।।**
**अम्बापि गर्भिणी भूत्वा कालेऽसूत सुतौ शुभौ । स त्रैमासिकयोः शिश्वोः प्राहाम्बां शृणु मेऽम्ब भोः ।।४८।।**
**जातौ द्वौ ते भविष्यन्ति पुत्रौ पुत्री च सत्तमाः । देह्याज्ञां म इति प्रोक्त्वा तदाज्ञप्तः प्रचक्रमे ।।४९।।**

भो सत्यसङ्कल्प, ते विघ्नं मा अस्तु। मयि इदं रूपं स्थिरीकुरु। च यावत् पुत्रो भविष्यति अत्र स्थेयम्'।४६। तथा इत् उक्त्वा असौ तत्र स्थित्वा, ताभ्यां ईश+बुद्ध्या सुपूजितः, एष वेद+वाक् विदुषः अपि शिष्यान् शिक्षितवान्।४७। अम्बा अपि गर्भिणी भूत्वा काले शुभौ सुतौ असूत। शिश्वोः त्रै+मासिकयोः (सतोः) सः अम्बां प्राह। भोः मे अम्ब, शृणु।४८। (अधुना) ते द्वौ (पुत्रौ) जातौ। (परं) सत्तमाः पुत्रौ पुत्री च भविष्यन्ति। मे (गन्तुं) आज्ञां देही। इति प्रोक्त्वा तत्+आज्ञप्तः प्रचक्रमे।४९।

आपण आपला संकल्प खरा करणारे आहांत, आपल्या उपक्रमाला मी विघ्न करीत नाही. माझ्या चित्तांत हे आपले रूप स्थिर व्हावे तसेच आम्हांला पुत्र होईपर्यंत आपण इथेच राहावे अशी माझी प्रार्थना आहे.४६. मातेच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरु तिथे राहिले. त्यांच्या मातापित्यांनी त्यांचे ईश्वरबुद्धीने उत्तम प्रकारे पूजन केले. तसेच वेद हेच ज्याची वाणी आहेत अशा श्रीगुरूंजवळ अनेक विद्वान् शिष्यसुद्धां शिकूं लागले. पद, वाक्य, प्रमाणांनी उत्पन्न होणाऱ्या संशयरहित ज्ञानाचा त्यांना श्रीगुरूंनी उपदेश केला.४७. अम्बेनेही यथाकाल गर्भ धारण करून दोन छानशा मुलांना जन्म दिला. ती जुळी बाळे तीन महिन्यांची झाली असतां त्या श्रीगुरूंनी आईला बोलावून म्हटले, हे माझे आई, ऐक!४८. आतां तुला दोन पुत्र झाले आहेत. पुढे अगदी उत्तम असे आणखी दोन पुत्र आणि एक मुलगी तुला होतील. तरी आतां मला जाण्याची आज्ञा दे. असे बोलून आणि आणि मातेचा निरोप घेऊन श्रीगुरू घरांतून जायला निघाले.४९.

**रेजे शिरस्त्राणविशोभिमूर्धा सुपादुकामण्डितपादपद्मः ।**
**काषायवस्त्रावृतपेशलाङ्गः कौपीनधृग्दण्डकरः स्मितास्यः ।।५०।।**
**क्षमस्वार्भबुद्ध्या मयाजापराद्धमिति व्याहरन्तीं सतीं त्रिंशताब्दैः ।**
**पुनर्दर्शनं मेऽस्तु सांनिध्यमम्ब स्मृतावित्थमुक्त्वा ययौ तां निवर्त्य ।।५१।।**
**नायं मर्त्योऽस्तीश एनं नताः स्म एवं सद्भिः स्तूयमानो मुनीनः।**
**योगीशोऽपि द्राग्बदर्याश्रमं सद् द्रष्टुं काशीं प्राप वेषान्मुमुक्षोः ।।५२।।**

शिरः+त्राण+विशोभि+मूर्धा सुपादुका+मंडित+पाद+पद्मः काषाय+वस्त्र+आवृत+पेशल+अंगः कौपीन+धृक्+दण्ड+करः स्मित+आस्यः रेजे।५०। (हे) अज! मया अर्भ+बुद्ध्या अपराद्धं क्षमस्व! इति व्याहरन्तीं सतीं, (हे) अम्ब, त्रिंशत+अब्दैः मे पुन+दर्शनं अस्तु। स्मृतौ मे सान्निध्यं अस्तु। इत्थं उक्त्वा तां(तान्) निवर्त्य ययौ।५१। अयं मर्त्यः न (किंतु) ईशःअस्ति। एनं नताः स्म। एवं सद्भिः स्तूयमानः मुनीनः योगीशः अपि बदरि+आश्रमं द्रष्टुं मुमुक्षु+वेषेण काशीं प्राप।५२।

त्या वेळी जगदुद्धारासाठी घराबाहेर पडणाऱ्या त्या श्रीगुरूंच्या बालमूर्तीचे ध्यान या श्लोकांत दिले आहे. शिरस्त्राणाने मढवलेला चेहरा, छानशा पादुकांनी सजवलेली पदकमले, भगव्या वस्त्राने आच्छादलेली कोमल काया, कांसेला लंगोटी, चिमुकल्या हातांत दंड आणि स्मिताने विकसलेले तेजस्वी मुखकमल असे ते श्रीगुरू शोभत होते.५०. 'जन्मादि देहधर्मातीत परमेश्वरा! मी बालबुद्धीने (अजाणतेपणाने किंवा तुला सामान्य बालक समजून) जे अपराध केले आहेत - तुला अडवले, बांधले, खाण्यापिण्यांत हेळसांड केली, कडेवर घेतले नाही किंवा वेळींच धुतले-पुसले नाही, त्यांची मला क्षमा कर!' अशी काकळूत करणाऱ्या त्या साध्वीला, 'तीस वर्षांनी तुला पुन्हा भेटेन, तूं स्मरण करतांच तुझ्या चित्तांत प्रकटेन' असे आश्वासन देत तिला (आणि बरोबरच्या इतरही मंडळींना) निरवून श्रीगुरूंनी प्रयाण केले.५१. त्या वेळी सर्व साधुसज्जन म्हणूं लागले, 'हा बालक खरोखर मर्त्य मानव नाही तर साक्षात् ईश्वरच आहे. आपण ह्याला नमस्कार करूं या.' अशा प्रकारची वाखाणणी स्वीकारत, मुनिश्रेष्ठ योगीश्वर असूनही मुमुक्षूच्या वेषाने बदरिकाश्रमाच्या वाटेवर काशीला येऊन थांबले.५२.

**स खेचरत्सहृज्जिह्व उन्मन्यावस्थयाऽतपत् । तपः श्वासोच्छ्वासहीनः काश्यां वज्रासनस्थितः ।।५३।।**
**भागीरथ्यां त्रिषवणमथाप्लुत्य साष्टाङ्ग्योगं युञ्जन्तं तं सकलमुनयः प्रेक्ष्य सिद्धासनस्थम् ।**
**नत्वाष्टाङ्गैः परतरधिया खेचरीमुद्रयैक-कुम्भोद्युक्तं जगुरुपरता नादसिद्धोत्समाधिम् ।।५४।।**

सः काश्यां वज्रासन+स्थितः खे+चरत्+स+हृत्+जिह्वः श्वास+उछ्वास+हीनः उन्मन्या अवस्थया तपः अतपत्।५३। भागीरथ्यां आप्लुत्य त्रिषवणं सिद्धासनस्थं स+अष्टांग+योगं युञ्जन्तं परतर+धिया खेचरी+मुद्रया एक+कुंभ+उद्युक्तं नाद+सिद्ध+उत्+समाधिं तं प्रेक्ष्य सकल+मुनयः उपरता परतर+धिया जगुः।५४।

काशीमध्ये वज्रासनावर (इथे त्याचा अर्थ सिद्धासन असा श्रीस्वामिमहाराजांनी केला आहे) जिह्वेसह मन आकाशांत नेणारी खेचरी मुद्रा धारण करून, श्वासोच्छ्वासरहित केवलकुंभक साधून, उन्मनी अवस्थेत खडतर तपाचे आचरण केले. तपानेच ब्रह्माला जाणावे या तैत्तरीय उपनिषदाच्या उक्तीचे (३:२) हे प्रात्यक्षिक लोकशिक्षणासाठी केले. श्रीगुरू नित्यमुक्त असल्याने त्यांना ह्या तपाचे कांहीच प्रयोजन नव्हते.५३. गंगेमध्ये त्रिकाल स्नान करून योगाच्या आठही अंगांचा अभ्यास करणाऱ्या, परमपदी बुद्धी स्थिरावणाऱ्या खेचरी (**खे** म्हणजे आकाश - सहस्रार चक्रांत जिह्वा आणि मन वि**चर**ते त्या) मुद्रेसहित, हठयोगप्रदीपिकेने सर्वश्रेष्ठ मानलेला (१:४५) केवलकुंभक साधून, अनाहतनादाच्या अनुसंधानाने सिद्ध झालेल्या उत्कृष्ट निर्विकल्प समाधीत निमग्न अशा त्या बालवयांतील श्रीगुरूंना पाहून काशीतील सर्व संन्यासी, 'हा परमेश्वरच आहे' अशा बुद्धीने त्यांच्या जवळ आदराने येऊन साष्टांग नमस्कार करून त्यांना म्हणाले.५४.

**भवान्परात्मास्ति न मर्त्यबालः सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारः ।**
**प्राक्शंकराचार्यमतोऽपि लुप्तः संन्यास एनं वितनोतु तिष्ये ॥५५॥**
**कष्टोत्थाद्यन्तवत्स्पर्श-भूभोगसुरतात्मभिः । उच्छिन्नोऽध्यात्मसौख्याज्ञैरयं कलिहतात्मभिः ॥५६॥**
**भीरूग्रे सुलभक्षेमे कलौ संन्यासवर्त्मना । अध्यात्मपरमानन्दं भगवन्दातुमर्हसि ॥५७॥**

भवान् मर्त्य+बालः न, (किन्तु) पर+आत्मा अस्ति। सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारः। प्राक् शंकराचार्य+मतः अपि संन्यासः तिष्ये लुप्तः। एनं (भवान्) तनोतु।५५। कष्ट+उत्थ+आदि+अन्त+वत्+भू+भोग+सुरत+आत्मभिः कलि+हत+आत्मभिः अध्यात्म+सौख्य+अज्ञैः अयं उच्छिन्नः।५६। (हे) भगवन्! भीरु उग्रे सुलभ+क्षेमे कलौ संन्यास+वर्त्मना अध्यात्म+परम+आनंदं दातुं अर्हसि।५७।

आपण सामान्य मानवी बालक नाहीत तर प्रत्यक्ष परमेश्वरच आहांत. साधूंच्या आणि धर्माच्या रक्षणासाठी आपण अवतार धारण केला आहे. पूर्वी शंकराचार्यांनी प्रतिष्ठित केलेला संन्यासमार्ग या कलिकाळांत सुप्तप्राय झाला आहे. त्याचा आपण प्रसार करावा. वास्तविक स्मृतिकारांनी अग्निहोत्र, यज्ञांत पशूचा बळी, संन्यास, श्राद्धांत मांसपाक, दीरापासून पुत्रोत्पत्ती या पांचांचा कलियुगांत निषेध असतांना संन्यासाच्या पुनःप्रतिष्ठेची प्रार्थना करण्याचे कारण असे आहे की स्मृतींनीच कलिकाळांतही जोंपर्यंत वेदांचे अध्ययन चालू आहे, वर्णाश्रमधर्माचे आचरण करणारे लोक आहेत तोंवर अग्निहोत्र आणि संन्यास यांचा स्वीकार करण्याची आज्ञाही स्मृतींनी केलेली आहे.५५. स्वाभाविक अशा विषयसुखांत आसक्त असलेल्यांनी या कष्टकर संन्यासाचा आश्रय कां बरे करावा? तर तो मोक्षात लाभणाऱ्या नित्य, निरुपाधिक, निरतिशय सुखासाठी! असे जर आहे तर मग तो संन्यासमार्ग लोकांनी कां टाकून दिला? याचे उत्तर या श्लोकांत दिले आहे. खरे तर इंद्रियांच्या आणि विषयांच्या संयोगापासून उद्भवणाऱ्या भोगांना आदि आणि अंत असतात. ते भोग अनित्य असतात, क्षणभंगुर असतात. तसेच ते विषयपरतंत्र असतात. हवा असलेला विषय हवा तेव्हां मिळेलच असे नसते. त्या सुखांना सीमा असते. अशा या विषयोपभोगांत रमून गेलेल्या, कलीच्या प्रभावाने बुद्धी दूषित झालेल्या आणि म्हणूनच अध्यात्मांतील स्वतंत्र, निरंतर आणि असीम सुखाची जाणीवही नसलेल्या जनसामान्यांनी ह्या संन्यासमार्गाचा उच्छेद केला आहे.५६.

**इत्याश्रुत्योक्तमाचार्यं वृत्वा कृष्णसरस्वतीम् । ततः संन्यास्यभून्नाम्ना स नृसिंहसरस्वती ।।५८।।**
**न्यस्तसूत्रशिखो रेजे न्यस्तसर्वैषणो वशी । संन्यस्ताखिलसङ्कल्पः संन्यासी निर्ममोऽद्वयः ।।५९।।**
**संन्यासपद्धतिं प्राह मुमुक्षुभ्यो जगद्गुरुः । विरजोमाञ्छुचिर्देवीं प्रविष्टो हापितैषणः ।।६०।।**

इति (तैः) उक्तं आश्रुत्य, कृष्णसरस्वतीं आचार्यं वृत्वा ततः स नाम्ना नृसिंहसरस्वती संन्यासी अभूत्।५८। न्यस्त+सूत्र+शिखः न्यस्त+सर्व+एषणः वशी संन्यस्त+अखिल+संकल्पः निर्ममः अद्वयः संन्यासी रेजे।५९। (ततः) जगद्गुरुः मुमुक्षुभ्यः संन्या+पद्धतिं प्राह। शुचिः विरजोमान् देवीं प्रविष्ट त्यक्त+एषणः (संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्)।६०।

भगवंता! भित्र्यांना उग्र भासणाऱ्या, पण तरी मोक्षप्राप्ती ज्या युगांत सुगम आहे अशा या कलिकाळांत संन्यासाच्या मार्गाने अध्यात्माचे परमसुखाचे दान देण्यास आपणच समर्थ आहांत.५७. अशा त्यांच्या म्हणण्याला मान देऊन श्रीगुरूंनी कृष्णसरस्वतींना गुरू करून संन्यास घेतला आणि नृसिंहसरस्वती हे नांव धारण केले.५८. केवळ नावानेच नाही तर आचरणानेही ते संन्यासी झाले. संन्यासधर्माला अनुसरून शेंडी आणि जानवे तर त्यांनी त्यागलेच, पण त्याचबरोबर दारा (पुत्र), वित्त आणि लौकिक या तीनही एषणांचाही त्याग केला; समस्त संकल्पांचाही त्याग केला; विषयांच्या त्यागाने इंद्रियांवर ताबा मिळवला; ममता आणि सुख-दुःखादि द्वंद्वांचासुद्धां त्याग करून ते संन्यासधर्माला भूषणावह झाले. कठरुद्रोपनिषदाच्या (५) वचनानुसार यज्ञोपवीत आणि वैदिक कर्मादिकांचा त्याग करून परमहंसोपनिषदांत (२) ज्याला मुख्य संन्यासी म्हटले आहे असे ते परमहंस झाले.५९. त्यानंतर जगद्गुरू श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांनी मुमुक्षूंना संन्यासधर्माचे शिक्षण द्यायला आरंभ केला. 'कुत्र्याच्या वांतीप्रमाणे सर्व - ब्रह्मलोकापर्यंत ऐहिक आणि पारलौकिक मनापासून पूर्णपणे त्यागावे; शिखा तसेच यज्ञोपवीत काढून टाकावीत; प्रायश्चित्तांनी शुद्ध व्हावे; विरजा होम करावा; गायत्रीप्रवेश करावा आणि तीनही एषणांचा त्याग करावा.' परमहंसोपनिषदाच्या (२) वचनाला अनुसरून आपल्या शरीरभोगासाठी आणि लोकोपकारासाठी लंगोटी, दण्ड आणि छाटी यांचा परिग्रह करावा. हा दंडी या शब्दाचा भावार्थ आहे. वर सांगितलेल्या मुख्य संन्यासाहून वेगळा आहे. हा विविदिषा संन्यास आहे. विद्वत् संन्यास नव्हे. अशा रीतीने विविदिषा संन्यास घेऊन सद्गुरूंना शरण जावे.६०.

**संन्यस्तसकलोऽसूत्र-चूडो दण्डी गुरुं भजेत् । प्रज्ञानं ब्रह्मायमात्मा ब्रह्म तत्त्वमसीति च ।।६१।।**
**अहं ब्रह्मास्मीति महा-वाक्यान्याप्त्वार्थतो वशी । पञ्चीकरणविल्लब्ध-संज्ञः शौची स्वधर्मवित् ।।६२।।**
**दैवभावो योगपट्टी संन्यासी श्रेयसेऽर्हति । गतिज्ञो धारणाभ्यासाज्जीवन्मुच्येत्परात्मदृक् ।।६३।।**

(संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्।) 'प्रज्ञानं ब्रह्म', 'अयमात्मा ब्रह्म', 'तत्त्वमसि' इति अहं 'ब्रह्मास्मि' इति च महावाक्यानि अर्थतो आप्त्वा, पंचीकरण+वित् लब्ध+संज्ञः शौची स्वधर्म+वित् दैवभावो, योगपट्टधारी संन्यासी श्रेयसे अर्हति। गतिज्ञो धारणा+अभ्यासात् परात्म+दृक् जीवन् मुच्येत।६१-६३।

ऋग्वेदांतर्गत (ऐतरेय उ. ३:१:३) 'प्रज्ञानच ब्रह्म' (आहे), यजुर्वेदांतर्गत 'मी ब्रह्म आहे' (बृहदारण्यक उ.१:४:१०), सामवेदांतर्गत, 'ते तू आहेस', (छांदोग्य उ. ६:८:७) आणि अथर्ववेदांतर्गत 'हा आत्मा ब्रह्म (आहे)' (मांडूक्य उ. २) ही चार महावाक्ये सद्गुरूंकडून त्यांच्या अर्थासह श्रवण करावीत.

**प्रज्ञानं ब्रह्म :-** ऐतरेय उपनिषदांत प्रथम केवळ एक ब्रह्मच काय ते होते; दुसरे कांहीच नव्हते. त्या एकमेवाद्वितीय ब्रह्माने ईक्षणमात्रे चराचर सृष्टी केली. सर्व इंद्रिये निर्मिली. जीवांच्या दैनंदिन व्यवहारासाठी नेत्र, कण्ठ आणि हृदय या स्थानी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या अवस्था निर्मिल्या. देहांतराच्या व्यवहारासाठी पितृशरीर, मातृशरीर आणि स्वशरीर असा सर्व प्रपंच निर्माण करून त्यांत प्रवेश केला. ह्या अध्यारोपाचा अपवाद करण्यासाठी तो देहप्रविष्ट प्रत्यगात्मा ब्रह्मस्वरूपच आहे असे प्रतिपादन उपनिषदांत केले आहे. त्यानंतर आत्मज्ञानाचे मुख्य साधन जे वैराग्य त्याच्या उत्पत्तीसाठी *'पुरुषे ह वा'* (ऐतरेय उ. २:१:१) इत्यादींनी गर्भवासादि दुःखांचे वर्णन करून प्रज्ञारूपी आत्माच ब्रह्म आहे हे या वाक्याने प्रतिपादले आहे. विद्यारण्यस्वामींनी ह्या महावाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे.

**ब्रह्मीभूतस्य गव्यात्मा व्यसुः क्षेप्योऽप्क्रियादि नो । इत्युक्त्वा ग्राहयामास संन्यासं स्वधिकारिणः ।।६४।।**

ब्रह्मीभूतस्य व्यसुः आत्मा गवि क्षेप्यः। अप्+ क्रियादि नो। इति उक्त्वा सु+अधिकारिणः संन्यासं ग्राहयामास।६४।

*येनेक्षिते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादू विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितं ।*
*चतुर्मुखेन्द्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्म मय्यपि ।। पंचदशी ५:१-२*

ब्रह्मदेव, इंद्रादि देव तसेच मनुष्य, घोडे, गाई इत्यादीसुद्धां ज्या एका चैतन्याद्वारे ऐकतात, हुंगतात, व्यक्त करतात, गोड-अगोड अनुभवतात त्याला प्रज्ञान म्हणतात. तेच प्रज्ञान माझ्यांतही आहेच. तेच ब्रह्म होय.

**अहं ब्रह्मास्मि -** हे यजुर्वदांतर्गत महावाक्य आहे.

*परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि । बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ।*
*स्वतःपूर्णः परात्मात्र ब्रह्माब्देन वर्णितः । अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म भवाम्यहं ।। पंचदशी ५:३-४*

अधिकारी साधकांच्या बुद्धीत साक्षित्वाने अहं म्हणून स्फुरणारे चैतन्य (जीवात्मा) हा 'मी' शब्दाचा अर्थ. सर्वव्यापी सच्चिदानंद स्वयंपूर्ण परमात्मा म्हणजेच 'ब्रह्म'. 'आहे' या शब्दाने दोहोंचे ऐक्य दाखविले आहे.

**तत्त्वमसि -** हे सामवेदांतर्गत वाक्य आहे.

*एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितं । सृष्टेः पुराधुनाऽप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ।*
*श्रोतुर्देहेन्द्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितं । एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयतां ।। पंचदशी ५:५-६*

**ततः प्रभृति संन्यासः संप्रवृत्तोऽमृतायनः । काश्यां पुमर्थवेदार्थान्प्रकाश्योत्तरवर्त्मना ।।६५।।**

ततः प्रभृति अमृतायनः संन्यासः संप्रवृत्तः। काश्यां पुं+अर्थ+वेद+अर्थान् प्रकाश्य उत्तर+वर्त्मना ।६५।

सृष्टीच्या पूर्वी आणि प्रलयाच्या नंतरही जसेच्या तसेच राहणाऱ्या, अविकारी, एकमेवाद्वितीय, सच्चिदानंद परमात्मस्वरूपाला 'ते' (तत्पदाने) म्हणून श्रवण करणाऱ्या शिष्याच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या पलीकडील चैतन्याचा 'तू' या शब्दाने (त्वंपदाने) निर्देश केला आहे. 'आहेस' (असिपदाने) शब्दाने हे दोन्हीचा अभेद प्रतिपादला आहे.६१.

**अयमात्मा ब्रह्म -** हे अथर्ववेदांतील महावाक्य आहे.

*स्वप्रकाशापरोक्षत्वमयमित्युक्तितो मतं । अहंकारादिदेहांतात्प्रत्यगात्मेति गीयते ।*
*दृश्यमानस्य सर्वस्य जगत्स्तत्त्वमीर्यते । ब्रह्माब्देन तद्ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम ।। पंचदशी ५:७-८*

आपल्या अंतरांत प्रकाशून प्रतीतीला येणारा अपरोक्ष 'हा' अहंकाराने स्थूल देहाला बांधल्यासारखा भासणारा 'आत्मा'च (प्रत्यगात्मा) अनुभवाला येणाऱ्या सर्व जगताचे मूलतत्त्व असलेले 'परोक्ष ब्रह्म' आहे असा याचा अर्थ आहे.

*सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः । ब्रह्मापरोक्षसिद्ध्यर्थं महावाक्यमितीरितम् ।*
*वाक्यवृत्तावतो ब्रह्मापरोक्ष्यविमतिर्न हि ।। पंचदशी ७:६९-७०*

ही महावाक्ये त्यांच्या अर्थासह जाणून पंचीकरणाचे ज्ञान प्राप्त करून संज्ञा म्हणजे संन्यासाश्रमांतील नांव (योगपट्ट) धारण करून, बाह्य आणि आंतरिक शौच (बाहेरी कर्में क्षाळिला। अंतरीं ज्ञानें उजळिला।) संपादन करून आपल्या (संन्यास) धर्माचे पालन करणारा,६२. दैवी संपत्तीयुक्त योगपट्टधारी संन्याशालाच मोक्षाची योग्यता असते. उत्तरायण, शुक्ल पक्ष आणि दिवस या काळांच्या अभिमानी देवतांद्वारां गंवसणाऱ्या सूर्यकिरणानुसारी गतीचे ज्ञान असणारा हा संन्यासी ब्रह्मसूत्रांत सांगितल्याप्रमाणे (४:२:१८-२०) रात्री किंवा दक्षिणायनांतही मरण पावला तरी ब्रह्मलोकालाच जातो.

**मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मापि सुशिष्ययुक् । तीर्थस्नातो ययौ गङ्गा-सागरं भक्तगुप्तये ।।६६।।**

मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मा+अपि सुशिष्य+युक् तीर्थ+स्नातो भक्त+गुप्तये गंगा+सागरं ययौ।६५-६६।

अशा यतीला धारणेच्या अभ्यासाने जिवंत असतांनाच मुक्तीचा लाभ होतो. नाभी, हृदय, आज्ञाचक्र इत्यादि देशांवर चित्त एकाग्र करणे म्हणजे 'धारणा'. त्या धारणेचा नित्य अभ्यास करणारा यति, **पर** म्हणजे ब्रह्म आणि **आत्मा** म्हणजे प्रत्यगात्मा यांच्यांत अभेद दृष्टी ठेवून जिवंतपणीच अविद्या, काम आणि कर्म यांच्यापासून मुक्त होतो.६३. ब्रह्मीभूत झालेल्या गतप्राण यतीचा देह शक्य तर पाण्यांत सोडावा अथवा ते शक्य नसेल तर जमिनीत पुरावा. **गो** या शब्दाचे पाणी आणि भूमी असेही अर्थ होतात. गतप्राण हे मुंडकोपनिषदांत (३:२:७) वर्णन केलेल्या सर्व कलांच्या निर्गमनाचे उपलक्षण आहे. पंचदश कला आपल्या आधारभूत महाभूतांसह इंद्रियांच्या अधिष्ठानभूत देवतांत विलीन होतात. कर्म, बुद्धी आणि आत्मा हे सर्व परमात्मस्वरूपाशी एकत्व पावतात. छांदोग्य उपनिषदाच्या कथनानुसार (४:१५:५) अशा ज्ञानी पुरुषाच्या देहाचे दहन केले अथवा न केले तरी तो देवयान पंथाने ब्रह्मलोकाला जातो. त्यावर भाष्यकारांनी त्यांचे दहन करू नये असे स्पष्ट केले आहे. अप् म्हणजे जल. जलक्रिया या शब्दाने अंजली, पिंड, निर्वाप, एकोद्दिष्ट श्राद्ध, करण, मासिक श्राद्ध इत्यादि करूं नयेत. मुलगा असेल तर त्याने इतर पितरांसाठी आणि पुत्रत्वाचे कर्तव्य म्हणून पार्वण श्राद्ध करावे. असा हा संन्यासधर्म सर्वांना सांगून श्रीगुरू उत्तम अधिकारी शिष्यांनाच संन्यास देत असत. यावरून अनधिकारी शिष्याला दिलेला संन्यास त्याच्या पतनालाच कारण होतो हे लक्षांत ठेवावे.६४.

तेव्हांपासून मुक्तीचा मार्ग असा संन्यासाश्रम पुनःप्रतिष्ठित झाला. अशा रीतीने श्रीगुरूंनी कांही काळ काशीत चित्तांतील अंधःकार दूर करणाऱ्या वेदांच्या बोधाने योग्य शिष्यांना चारी पुरुषार्थ प्राप्त करविले. नंतर उत्तरेकडील मार्गाने मेरूला सव्य प्रदक्षिणा करून स्वतः पावित्र्याची मूर्ती असलेले श्रीगुरू भक्तांच्या रक्षणासाठी तीर्थांमध्ये स्नान करीत गंगासागराला येऊन पोचले.६५.

**कारयित्वा बहिःस्पर्शान्बाह्यान्सोऽन्ते दृशं भ्रुवोः । प्राणापानौ च खे तुल्यौ यतिभ्यो योगमादिशत् ।।६७।।**
**प्रयागेऽथैत्य संन्यासं माधवब्रह्मणे ददौ । विभुस्तत्त्वोपदेशं च निजोद्भवभुवं ययौ ।।६८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**यत्प्रसादान्नरा मुक्ता अद्वैतामृतवर्षिणः । भवन्त्यस्य किमाचार्यैः कोऽयं कृष्णसरस्वती ।।६९।।**

बहिः+स्पर्शान् बाह्यान् कृत्वा सः दृशः अन्ते भ्रुवोः (कारयित्वा), प्राण+अपानौ खे तुल्यौ (कारयित्वा) यतिभ्यः योगं आदिशत्।६७। अथ प्रयागे एत्य विभुः माधवब्रह्मणे संन्यासं तत्त्व+उपदेशं च ददौ। (ततः) निज+उद्भव+भुवं ययौ।६८। नामधारक उवाच। अद्वैत+अमृत+वर्षिणः यत्+प्रसादात् नरा मुक्ता भवन्ति अस्य किं आचार्यैः? अयं कृष्णसरस्वती कः?६९।

बाहेरच्या रूपरसादि विषयांचे चिंतन केल्याने ते चित्तांत प्रवेश करतात. त्यासाठी त्यांचे चिंतन सोडून त्यांना बाहेरच ठेवायचे. मग दृष्टी भुंवयांच्या मध्यावर स्थिर करायची. डोळे एकदमच मिटले तर चित्त झोपेत लीन होते आणि उघडे ठेवले तर ते चित्त बाहेरच्या विषयांकडे धांवतेय म्हणून अर्धोन्मीलित दृष्टीने भुंवयांच्या मध्यावर दृष्टी केंद्रित करून ती हृदयाकाशांत स्थिर करावी. नासिकेंतून प्रवाहित होणारे श्वास आणि उच्छ्वास मंद करून ते नासिकेंतच सम करायचे. अशा प्रकारच्या ह्या योगाचा अभ्यास यतींच्याकडून श्रीगुरूंनी करून घेतला.६७. त्यानंतर श्रीगुरूंनी प्रयाग क्षेत्री येऊन माधव नांवाच्या ब्राह्मणाला संन्यास दिला आणि त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. तेथून पुढे ते आपल्या जन्मभूमीला गेले.६८. यावर नामधारकाने प्रश्न केला की मोक्षरूपी अमृताची वृष्टी करणाऱ्या श्रीगुरूंच्या प्रसादाने मानवांना मुक्ती मिळते. त्यांना आचार्य करण्याचे काय प्रयोजन? शास्त्रार्थाचे आलोडन करून त्यांतील वेचक तत्त्वांचा इतरांनाही बोध करून देऊन त्यांच्याकडून ती आचारणात आणतात आणि स्वतःसुद्धां त्यांचे आचरण करून आदर्श उभा करतात त्यांना आचार्य म्हणतात. (*'आचिनोति हि शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि। स्वयं चाचरते यस्मात्तेनाचार्यः स उच्यते।।'*) आणि हे कृष्णसरस्वती कोण होते?६९.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सांदीपनिवसिष्ठाद्याः कृष्णरामादिभिर्वृताः । गुरवोऽपि तथाऽजेन वृतः कृष्णसरस्वती ।।७०।।**
**मानुष्यं लीलयासाद्य स तद्वद्वर्तते न चेत् । वर्तेत सङ्करो लोके भवेत्तदनुवर्तितः ।।७१।।**
**येनाध्यक्षेण मा सूते जगत्तेन न बद्ध्यते । असक्तोऽयमुदासीन-वत्स्थितः किमुतेतरैः ।।७२।।**
**शिष्यो विष्णुः पुरेशस्य विष्णोर्विधिरभूद्विधेः । वसिष्ठस्तस्य शाक्त्योऽस्य व्यासस्तस्य शुकोऽस्य तु ।।७३।।**
**गौडपादोऽस्य गोविन्दः शंकरस्तस्य तस्य तु । विश्वरूपस्तस्य बोध-ज्ञानः सिंहगिरिस्तथा ।।७४।।**
**तस्येश्वरो नृसिंहोऽस्य विद्यातीर्थं ततः शिवः । तस्य भागीरथीतीर्थं विद्यारण्योऽस्य तस्य तु ।।७५।।**
**शिष्योऽभून्मलयानन्दो देवतीर्थं सरस्वती । यादवेन्द्रोऽस्य तस्यायं शिष्यः कृष्णसरस्वती ।।७६।।**

सिद्ध उवाच। कृष्ण+रामदिभिः अपि सांदीपनि+वसिष्ठाद्याः गुरवः वृतः। तथा अजेन कृष्णसरस्वती वृतः।७०। लीलया मानुष्यं आसाद्य सः तत्+वत् वर्तते। न वर्तते चेत् तत्+अनु+वर्तितः लोके सङ्करो भवेत्।७१। येन अध्यक्षेण मा जगत् सूते तेन अयं न बद्ध्यते। अयं असक्तः उदासीनवत् स्थितः। इतरैः किं उत?।७२। पुर+ईशस्य विष्णुः शिष्यः। विष्णोः विधिः (शिष्यो) अभूत्। विधेः वसिष्ठः। तस्य शाक्त्यः। तस्य व्यासः। तस्य शुकः। अस्य (शुकस्य) तु गौडपादः। अस्य गोविन्दः। तस्य शंकरः। तस्य (शंकरस्य) तु विश्वरूपः। तस्य बोधज्ञानः। तथा (तस्मात्) सिंहगिरिः। तस्य ईश्वरः। अस्य नृसिंहः। (अस्य) विद्यातीर्थः। ततः शिवतीर्थः। तस्य भागीरथीतीर्थः, अस्य विद्यारण्यः। तस्य तु मलयानंदः शिष्यः अभूत्। (तस्य) देवतीर्थः। (तस्य) सरस्वतीयादवेन्द्रः। अस्य अयं शिष्यः कृष्णसरस्वती।७३-७६।

सिद्ध सांगतात की राम, कृष्ण इत्यादि पूर्वींच्या अवतारांनीही सांदीपनि, वसिष्ठ इत्यादि गुरू केले. त्याचप्रमाणे अविकारी श्रीगुरूंनीही कृष्णसरस्वतींना गुरू केले.७०. स्वच्छेने लीलेने त्याने (भगवंताने) मानवदेह धारण केला असला तरी त्याला अनुसरून ते मानवांना योग्य असेच आचरण करतात. तसे त्यांनी न केले तर अनुकरणशील लोकही विपरीत आचरण करतील आणि भगवंत संकराला कारण होतील.७१.

**सर्वे स्वदीक्षाङ्किताख्या जाताः कृष्णसरस्वती । पारंपर्योत्तमो ज्ञानी वृद्धोऽतोऽयं वृतोऽमुना ॥७७॥**

**॥ इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनं नामाष्टमोऽध्यायः ॥**

सर्वे स्वदीक्षित+अंकित+आख्याः जाताः। कृष्णसरस्वती पार्यंपर+उत्तमः ज्ञानी वृद्धः। अतः अयं अमुना वृतः।७७।

आतां कृष्णसरस्वतींची गुरुपरंपरा सांगत आहेत. भगवान शंकरांचे शिष्य विष्णू, विष्णूंचे शिष्य ब्रह्मदेव; ब्रह्मदेवांचे शिष्य वसिष्ठ ऋषी; त्यांचे शिष्य पराशर; पराशरांपासून व्यास; व्यासांचे शिष्य शुकाचार्य; शुकाचार्यांचे गौडपादाचार्य; त्याचे शिष्य गोविंदयति; हे भ.पू.पा. शंकराचार्यांचे गुरू; आदिशंकराचार्यांचे शिष्य विश्वरूपाचार्य; त्यांचे बोधज्ञान; त्यांचे शिष्य सिंहगिरी; त्यांच्यापासून नृसिंह; मग विद्यातीर्थ, त्यांचे शिष्य शिवतीर्थ, त्यांचे भागीरथीतीर्थ; हे विद्यारण्यस्वामींचे गुरू; त्यांचे शिष्य मलयानंद; त्यांच्यानंतर देवतीर्थ; त्यांपासून सरस्वतीयादवेन्द्र; यांचेच शिष्य कृष्णसरस्वती होत.७३-७६. सर्वांचे योगपट्ट त्यांच्या त्यांच्या दीक्षेनुसार झाले. तीर्थ, आश्रम इत्यादि उपपदे उपदेश, दंडदानादींची दीक्षा ज्या गुरुस्वामींकडून घेतली त्याची असतात. इथे दिलेला परंपराक्रम हा ज्ञानोपदेशाचा आहे. त्यामुळे उपपदाची भिन्नता दिसून येते. हे कृष्णसरस्वती अशा उत्तम परंपरेचे ज्ञानी असल्याने तसेच वृद्ध असल्याने त्यांना श्रीगुरूंनी आचार्य केले.७७.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा आठवा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# नवमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। नवव्या अध्यायी जन्मभूमी पाहुनी। श्रीगुरु विप्राचा पोटशूल वारुनी।**
**सायंदेवाचे यवनभय हरुनी। तीर्थयात्रा वर्णिती।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भगवानपि संन्यासं प्रगृह्य स्वजनुस्थलम् । कुतो यातोऽस्य शिष्याः स्युः के के किमकरोत्ततः ।।१।।**

नामधारक उवाच। भग+वान् अपि संन्यासं प्रगृह्य स्व+जनु+स्थलम् कुतो यातः? अस्य शिष्याः के के स्युः? ततः (श्रीगुरुः) किं अकरोत्?१।

मागच्या अध्यायांत सिद्धमुनींनी श्रीगुरूंनी संन्यासाश्रम स्वीकारल्याचे वर्णन केले; आणि अध्यायाच्या शेवटी आपल्या जन्मभूमीला गेले असे सांगितले. तेव्हां नामधारकाला ते संन्यासाश्रमाला योग्य नाही असे वाटून त्याने प्रश्न केला आहे.

सर्व ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, औदार्य आदींनी संपन्न असलेल्या ('ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां **भग** इतीङ्गना।।') **भगवान्** श्रीगुरूंनी संन्यास घेऊनही ते आपल्या जन्मस्थळी कां गेले? त्यांचे शिष्य कोण कोण झाले? जन्मभूमीला जाऊन पुढे त्यांनी काय केले?१.

**।। सिद्ध उवाच ।।**

**महीं प्रदक्षिणीकृत्य प्रतिज्ञातानुसार्यजः । मातरं द्रष्टुमाप्तो हि माता वन्द्या यतेरपि ।।२।।**
**शिष्या हि बहवो जाता बालः कृष्ण उपेन्द्रकः । ज्ञानज्योतिः सदानन्दो माधवोऽहं च सप्तमः ।।३।।**
**सरस्वत्यन्तसंज्ञाः स्युरेते मुख्यास्तु भूरिशः । आसन्नन्ये स तैः साकमाययौ स्वजनुस्थलम् ।।४।।**

सिद्ध उवाच। महीं प्रदक्षिणी+कृत्य प्रतिज्ञात+अनुसारी अजः मातरं द्रष्टुं आप्तः। हि यतेः अपि माता वन्द्या।२। शिष्या हि बहवः जाताः। बालः, कृष्णः, उपेन्द्रः, ज्ञानज्योतिः, सदानंदः माधवः, अहं च सप्तमः।३। एते सरस्वति+अंत्य+संज्ञाः मुख्याः स्युः। अन्ये तु भूरिशः आसन्। सः तैः साकं स्वजनु+स्थलं आययौ।४।

तीस वर्षांनी पुन्हां माझे दर्शन होईल, असे आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी आणि माता संन्याशालाही वंदनीय असल्याने तिच्या दर्शनासाठी भगवान आले असे उत्तर देतांना सिद्ध म्हणतात पृथ्वीला (मेरु पर्वताला) उजव्या बाजूने परिक्रमा (प्र+दक्षिणं) करून **अजन्मा** श्रीगुरू (इथे अजन्मा शब्दांतून ते मर्त्य नसून केवळ माणूसपणाचे नाटक करीत असल्याचे सुचविले आहे) आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी संन्याशालाही वंद्य अशा मातेच्या दर्शनाला आले. श्रुतीच्या आज्ञेप्रमाणे (जाणत्याने सत्यच बोलावे; खोटे बोलणाऱ्याचा समूळ परिशोष होतो. प्रश्न उ. ६:१) आपल्या वचनाच्या पूर्तीसाठी श्रीगुरू कारंजाला आले. नामधारकाच्या पहिल्या प्रश्नाचे हे उत्तर आहे.२.

कोण कोण शिष्य झाले या प्रश्नाचे उत्तर पुढच्या श्लोकांत देत आहेत. आपल्या ज्येष्ठ पुत्राचे आयुष्य वाढावे अशा हेतूने जसे संसारी लोक त्याच्या नांवाचा उच्चार न करतां त्याला बाळ अशा नांवाने हांक मारतात त्याचप्रमाणे भगवंतांनीही आपल्या पुत्रवत् पहिल्या आणि निकटवर्ती शिष्याचे नांव बालसरस्वती असे ठेवले.

**पितरौ प्रेक्ष्य बन्धूंश्च भगिनीमितरानपि । तत्राददे विश्वरूपः पूजां प्रत्यालयं क्षणात् ।।५।।**

पितरौ, बंधून्, भगिनीं च, इतरान् अपि प्रेक्ष्य तत्र विश्वरूपः क्षणात् प्रति+आलयं पूजां आददे।५।

कारण शिष्यसुद्धां पुत्राप्रमाणेच गौणात्मा मानला आहे. व्यावहारिक पितासुद्धां संन्यास घेतांना किंवा मृत्यूच्या समयी पुत्राला 'तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस' असे अनुशासन करतो आणि त्यानुसार पुत्रही 'मी ब्रह्म आहे, यज्ञ आहे, लोक आहे' असे म्हणतो (बृहदारण्यकोपनिषत् १:५:१७). त्याचा भाव असा - तुम्ही शिकविलेल्या ब्रह्माचे म्हणजे वेदांचे मी अध्ययन आणि अध्यापन करीन, तुम्ही अनुष्ठिलेल्या यज्ञांचे मी अनुष्ठान करीन आणि तुम्ही संपादिलेले स्वर्गादि लोक मीही प्राप्त करीन. याच अर्थाने एतरेय उपनिषदांत (२:४) पुत्राला पुण्यकर्मांत प्रतिनिधित्व करणारा आत्मा असे म्हटले आहे. परमार्थमार्गांतही परम्परा अखंड चालण्यासाठी गुरू आपल्या शिष्याला प्रतिनिधित्व देतो. वेदांनीही शिष्यप्रशिष्य इत्यादि परंपरेला कुल अशीच संज्ञा दिली आहे. मुंडक (३:२:९) आणि मांडूक्य (१०) उपनिषदांत ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या कुळांत ब्रह्म न जाणणारा होत नाही असे म्हटले आहे त्याचा अभिप्राय गुरुकुल असाच आहे. बालसरस्वतीनंतर कृष्ण, उपेन्द्र, ज्ञानज्योती, सदानंद, माधव आणि सातवा स्वतः सिद्ध अशी मुख्य शिष्यांची नांवे सांगितली आहेत.३. सिद्ध पुढे म्हणतात परमगुरू कृष्णसरस्वतींनी दक्षिणमठ संप्रदायाला अनुसरून श्रीगुरूंना नरसिंहसरस्वती असा योगपट्ट दिला तसाच आम्हां सर्व शिष्यांच्याही नांवांच्या शेवटी सरस्वती हे उपनाम दिले. त्यांतील वरील सात जण मुख्य होत. त्याशिवायही अनेक इतर शिष्य होते. त्या सर्वांच्या सह श्रीगुरू आपल्या मातृभूमीला - कारंजाला आले.४. आई-वडील, बंधू, बहीण तसेच इतरही पूर्वाश्रमाचे संबंधी लोक यांना भेटून त्या कारंजा गांवी श्रीगुरूंनी एका वेळी अनेक रूपे धारण करून घरोघरी जाऊन सर्वांची पूजा स्वीकारली.५.

**पित्रार्चितममुं दृष्ट्वा प्राक्स्मृत्याऽम्बाब्रवीत्प्रिय । मृत्यून्मुखीं कुपुत्रां मां योऽरक्षच्छ्रीपदस्त्वयम् ।।६।।**
**मादृग्भवेत्सुत इति प्रतिज्ञातसुसिद्धये । स्वदृगन्यसुताभावात्स्वयमेवाभवत्सुतः ।।७।।**
**श्रीपाद मे त्वं न सुतोऽसि देव भवार्णवादुद्धर मा हरेऽज ।**
**लोकानुसारी खलु वर्तसे चेत् सम्बन्धमेनं स्मर पुत्र मातुः ।।८।।**
**कालदैवक्रियेशात्म-द्रव्याङ्गास्वात्मवैकृताः । तत्संघातः प्रवाहोऽसौ त्वन्मायैतां निवारय ।।९।।**

अमुं पित्रा अर्चितं दृष्ट्वा प्राक् स्मृत्या अम्बा अब्रवीत्, (हे) प्रिय, मां मृत्यु+उन्मुखीं कुपुत्रां यः अरक्षत् अयं तु श्रीपादः।६। मादृक् सुत भवेत इति प्रतिज्ञात+सु+सिद्धये स्व+दृक् अन्य+सुत+अभावात् स्वयम् एव सुतः अभवत्।७। (हे) देव, श्रीपाद, त्वं मे सुतः न असि। (हे) हरे, मां भव+अर्णवात् उद्धर। खलु लोक+अनुसारी वर्तसे चेत् (हे) पुत्र एनं मातुः सम्बंधं स्मर।८। काल+दैव+क्रिया+ईश+आत्म+द्रव्य+अङ्ग+असु+आत्म+वैकृताः तत् संघातः प्रवाहः असौ त्वत्+माया एतां निवारय।९।

त्या श्रीगुरूंची पूजा पिताजी माधव करीत असतांना अम्बामातेची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि ती आपल्या पतीला म्हणाली, 'प्राणनाथा, पूर्वजन्मी कुपुत्राच्या दुःखाने जीव द्यायला निघालेल्या मला वांचवणारा हाच श्रीपाद आहे.६. माझ्यासारखा पुत्र तुला होईल असा मला दिलेला वर तंतोतंत खरा करण्यासाठी, आपल्यासारखा त्रैलोक्यांत दुसरा कोणीच पुत्र न दिसल्यामुळे तो श्रीपादच आपल्या पोटी आला आहे!'७. 'हे श्रीपाद भगवंता, तूं माझा मुलगा नाहीस, साक्षात् हरी आहेस. मला या संसारसागरांतून तार! आणि तूं लोकव्यवहारानुसारच वागणार असशील तर पुत्रा, ह्या आईचे नाते ध्यानांत ठेव! पुं नांवाच्या नरकापासून सोडवणारा तोच पुत्र म्हणवतो ना?'८. '१ **काळ** हा क्षोभक, २ **कर्म** (क्रिया) हे निमित्त, ३ त्यांतला फलाभिमुख झालेला अंश म्हणजे **दैव** किंवा प्रारब्ध, ४ **ईश** म्हणजे जीव, ५ **आत्मा** म्हणजे कर्माच्या संस्कारापासून घडलेला त्याचा स्वभाव, ६ **द्रव्य** म्हणजे पंच तन्मात्रा (पांच महाभूतांचे सूक्ष्म अंश), ७ **अंग** म्हणजे त्यांनी घडलेला देह, ८ **असु** म्हणजे सूत्ररूप प्राण, ९ **आत्मा** म्हणजे अहंकार आणि १० **वैकृत** म्हणजे ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, मन आणि ५ महाभूते हे सोळा पदार्थ, या सर्वांचा संघात असलेल्या

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**संन्यासी यत्कुले जातस्तरत्यपि तरिष्यति । कुलैकविंशतिः पित्रोर्दुर्गताप्यमृतं लभेत् ।।१०।।**
**जातोऽत्रायं हि संन्यासी भो मातस्तेऽथ किं वद । सम्पत्प्रजान्वितानां वः काश्यां मुक्तिर्भविष्यति ।।११।।**

**।। भगिन्युवाच ।।**

**गतिर्मे काग्रतः स्वामिन्भवसिन्धोर्बिभेम्यहम् । पापिष्ठां मोद्धर हरे सद्गुरुस्त्वं हि मे प्रभो ।।१२।।**

श्रीगुरुः उवाच। 'यत्+कुले संन्यासी जातः (तत् कुलं) तरति अपि पित्रोः (भव्या) कुल+एकविंशतिः तरिष्यति। दुर्गतां अमृतं लभते'।१०। 'अत्र अयं हि संन्यासी जातः। भो मातः अथ ते किं वद्। सम्पत्+प्रजा+अन्वितानां वः काश्यां मुक्तिः भविष्यति'।११। भगिनी उवाच। '(हे) स्वामिन्, मे अग्रतः का गतिः? अहं भव+सिन्धोः बिभेमि। (हे) हरे, पापिष्ठां मां उद्धर। (हे) प्रभो त्वं हि मे सद्गुरुः'।१२।

लिंगदेहाचा जन्ममरणरूपी प्रवाह (देहरूपी बीजापासून कर्म आणि त्या कर्मापासूनच पुन्हा अंकुरणारा देह), ही सगळी देवा, तुझीच माया आहे. ही मिथ्या असली तरी आम्हांला तिचा पार सांपडत नाही. तूंच आम्हांला हिच्यापासून सोडव.'९.

श्रीगुरु म्हणाले, 'ज्या कुळांतील कुणी पुरुष संन्यासी होतो ते कुळ तर तरतेच पण माता आणि पिता या दोन्हीच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. कुणी नरकांतही गेले असले तर त्यांना मोक्ष मिळतो.' इथे मोक्ष म्हणजे आत्यंतिक मोक्ष नसून सापेक्ष - उच्चलोकप्राप्तीरूप मोक्ष समजावा.१०. 'तुमच्या ह्या कुळांत तर हा - साक्षात् परमात्मस्वरूप मी संन्यासी झालो आहे. हे माते, आतां तुझे आणखी काय करायचे राहिले आहे? संतती आणि संपत्ती यांनी समृद्ध असे तुम्ही उभयतां काशीक्षेत्री मुक्ती पावाल!'११. श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई त्यांना विनवीत आहे. 'महाराज, माझी यापुढे काय गती होईल? या संसारसमुद्राची मला भीती वाटते. आपणच माझे सद्गुरू आहांत. तरी माझा पापिणीचा आपण उद्धार करावा!'१२.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**पतिसेवनमेवैकं तारकं नापरं स्त्रियाः । पातिव्रत्यं भज ततो भवाब्धेः पारमेष्यसि ।।१३।।**
**दम्पत्योः प्राक्कृतं वैरं त्वया गौर्लत्तया हतः । अतः पत्युर्यतित्वं ते कुष्ठं चाङ्गे भविष्यतः ।।१४।।**
**इति श्रुत्वातिखिन्नाभूत्तामाश्वास्याह सद्गुरुः । वार्धक्ये तूभयं तेऽस्तु नश्येन्मे दर्शनात्कुरुक् ।।१५।।**
**इत्युक्त्वा तदनुज्ञातः सशिष्यो गौतमीं ययौ । याऽऽनीता गौतमेनेशाद् गोहत्याव्यपनुत्तये ।।१६।।**

श्रीगुरुः उवाच। 'स्त्रियाः पति+सेवनं एव एकं तारकं। न अपरम्। पातिव्रत्यं भज। ततः भव+अब्धेः पारं एष्यसि।१३। इति श्रुत्वा (सा) अति खिन्ना अभूत्। सद्गुरुः ताम् आश्वास्य आह। 'उभयं तु ते वार्धक्ये अस्तु। मे दर्शनात् कुरुक् नश्येत्।१४। प्राक् त्वया दम्पत्योः वैरं कृतम्। (तथा च) गौः लत्तया हता। अतः ते पत्युः यतित्वं च ते अङ्गे कुष्ठत्वं भविष्यतः'।१५। इति उक्त्वा (श्रीगुरुः) तत्+अनुज्ञातः सशिष्यः गौतमीं ययौ। या गौतमेन गो+हत्या+व्यपनुत्तये ईशात् आनीता।१६।

श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतीची सेवा हाच एक तरणोपाय आहे. अन्य कोणताही नाही. तरी तूं पातिव्रत्यधर्माचे पालन कर. त्याच्याच योगाने तू हा भवसागर पार करशील.'१३. हे ऐकून रत्नाबाई घाबरून व्याकुळ झाली. 'तेव्हां तिची समजूत घालीत सद्गुरू म्हणाले, 'ह्या दोन्ही गोष्टी तुझ्या उतारवयांत होतील. तसेच तुझा कुष्ठरोग माझ्या केवळ दर्शनानेच नाश पावेल.१४. पूर्वजन्मी तू पतिपत्नीत भांडण लावलेस आणि गोमातेला लाथ मारलीस. त्या योगे तुझा नवरा संन्यास घेऊन जाईल आणि तुझ्या शरीराला कुष्ठरोग होईल.'१५. असे बोलून श्रीगुरूंनी आपली भगिनी, बंधुवर्ग, माता, पिता आणि इतर कारंजवासीय संबंधितांचा निरोप घेतला; आणि शिष्यवर्गांसह ते दक्षिण दिशेला गोदावरीला गेले, ज्या नदीला गौतम ऋषींनी आपल्या तपोबलाने भगवान् शंकरांना प्रसन्न करून स्वर्गांतून सह्याद्रि पर्वतावर आणले. त्याची कथा कूर्मपुराणांत सविस्तर आहे.

**तामेत्याप्लुत्य भगवान्मुनिं माधवसंज्ञकम् । भक्तं गतानुगतान्मुक्त्वा स्तुतस्तेनाग्रतोऽगमत् ।।१७।।**
**सशिष्योऽग्रे व्रजन्दृष्ट्वा गङ्गायां मर्तुमुत्सुकम् । विप्रं गलशिलं कञ्चिदादिष्टैस्तं कृपानिधिः ।।१८।।**
**छात्रैरुद्धारितं दीनं शूलरोगाकुलं प्रभुः । दयनीयतमं प्राह विधत्से साहसं कुतः ।।१९।।**

तां एत्य आप्लुत्य भगवान् माधवसंज्ञकं मुनिं गत+आगतात् मुक्त्वा तेन स्तुतः अग्रतो अगमत्।१७। सशिष्यः अग्रे व्रजन् गङ्गायां मर्तुं उत्सुकं कश्चित् गलशिलं विप्रं दृष्ट्वा आदिष्टैः छात्रैः उद्धारितं दीनं शूलरोग+आकुलं दयनीयतमं कृपानिधिः प्रभुः प्राह, 'साहसं कुतः विधत्से?'१८-१९।

थोडक्यांत, ऋषींनी आपल्या स्वार्थासाठी मायेने दर्भापासून निर्माण केलेल्या गाईला गौतमांच्या साळी खाण्यासाठी प्रेरित केले. आपल्या साळींची राखण करण्यासाठी गौतमांनी तिचे निवारण केले तेव्हां त्यांच्या केवळ करस्पर्शानेच ती मायावी गाय मरण पावली. तेव्हां सर्व ऋषींनी मिळून गौतमांना ह्या गोहत्येच्या पातकापासून मुक्त होण्यासाठी स्वर्गांतून गंगा पृथ्वीवर आणण्याचे प्रायश्चित्त सांगितले. १६. त्या गोदावरी नदीवर येऊन त्यांनी स्नान केले. तिथे असलेल्या माधव नांवाच्या एका तपस्वी मुनीला त्यांनी आपल्या उपदेशाने जन्ममरणरूपी संसारांतून मुक्त केले. नंतर त्याने केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून ते पुढे निघाले.१७. शिष्यांसह गोदावरीतीराने पुढे गेल्यावर त्यांना गळ्यांत धोंडा बांधून आत्महत्येला उद्युक्त झालेला कुणी एक ब्राह्मण दिसला. आपल्या शिष्यांना सांगून दयासागर प्रभूंनी त्या पोटशूळाने तडफडणाऱ्या दीनवाण्या ब्राह्मणाला कां असे साहस करीत आहेस? असे विचारले.१८. तो ब्राह्मण उत्तरला, मला हे विचारून काय उपयोग? माझा दुःखनाश तुम्ही कराल काय? अन्नाचा वैरी असलेला हा पोटशूळ नांवाचा विकार आतां अगदी सोसवत नाही. मी कसा जगूं? या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांनी या विकाराची योगरत्नाकरांत दिलेलली लक्षणे उद्धृत केली आहेत.

**।। विप्र उवाच ।।**

**किं करिष्यसि मां पृष्ट्वा मरिष्ये शूलकातरः । कथं जीवामि रोगोऽन्न-वैर्ययं दुःसहः सदा ।।२०।।**
**प्राणोऽन्नं जीवनं चान्नं लयोऽन्नं जीवमन्नमुत् । उद्भवोऽन्नं कथं स्थेयमृतेऽन्नात्तन्मृतिर्वरम् ।।२१।।**

विप्र उवाच। मां पृष्ट्वा किम् करिष्यसि? शूलकातरः मरिष्ये। अन्न+वैरी अयं रोगः सदा दुःसहः। कथं जीवामि?२०। किं 'अन्नं प्राणः जीवनं च। अन्नं लयः। अन्नं जीवम्। अन्नं उद्भवः। अन्नात् ऋते कथं स्थेयम्? तत् मृतिः वरम्!२१।

कुशींत, जठराच्या पाठीमागे, स्तनांजवळ, पाठीच्या खालच्या भागांत यापैकीं एक वा अनेक भागांत हा शूल उत्पन्न होतो. थोडे कांही खाल्ल्याने, उलटी झाल्याने किंवा अन्नाचे पचन झाल्यावर हा शूळ शांत होतो. षाष्टिक, साळी, तांदूळ यांच्या सेवनाने हा शूल वाढतो. त्यांच्या परिणामाने उद्भवणारा हा शूल ही जाणण्याला कठिणतम अशी महाव्याधि आहे. (*'बलासः प्रच्युतस्थानात्पित्तेन सह मूर्छितः।। वायुमादाय कुरुते शूलं जीर्यति भोजने।। कुक्षौ जठरपार्श्वेषु नाभौ बस्तौ स्तनान्तरे।। पृष्ठमूलप्रदेशेषु सर्वेष्वेतेषु वा पुनः।। भुक्तमात्रेऽथवा वान्ते जीर्णान्ने च प्रशाम्यते।। षाष्टिकव्रीहिशालीनामोदनेन विवर्धते।। तत्परिणामजं शूलं दुर्विज्ञेयं महागदम्'*) १९.

स्वस्थानापासून भ्रष्ट झालेला कफ पित्ताशी संयुक्त होऊन वायूच्या साह्याने शूल निर्माण करतो. हा शूल भोजनाने कमी होतो.'अन्नगत प्राण असल्याने अन्न हेच जीवन आहे. झोपही अन्नानेच येते. औषधरूपाने जगवणारेही अन्नच आहे. वीर्यरूपाने परिणत होऊन अन्नच जन्माला कारण होते. अन्नाशिवाय कसे राहतां येईल? त्यापेक्षां मला मरणच बरे वाटते.२१. 'मी पूर्वजन्मी किंवा याच जन्मी न भुकेल्याला अन्न दिले न कांही पुण्य केले. तसेच मी कांही पुण्यकर्मही केले नाही. आईवडील, गुरू इत्यदिकांची निन्दा केली असावी.२२.

**भवान्तरेऽत्र वा नान्नं दत्तं पुण्यं न वा कृतम् । गोविप्रग्रासोऽपहृतो निन्दिताः पितरौ गुरुः ।।२२।।**
**नेशोऽर्चितो वातिथयो हापिता धिक्कृता द्विजाः । मिष्टान्नं पितरौ त्यक्त्वा साकं भुक्तं स्त्रिया मया ।।२३।।**
**इति भात्यन्यथा नेदृक्कष्टं भो मय्युपस्थितम् । कृतो नान्योपकारो भूभारो मोघभवोऽभवम् ।।२४।।**
**मा भीर्दास्येऽन्नपथ्यं ते दिव्यौषधमहं भिषक् । इत्युक्त्वा विरते तस्मिन्द्विज एकः समाययौ ।।२५।।**
**सायंदेवाभिधः काञ्ची-वासी कौंडिण्यगोत्रजः । सुदीनो यवनाधीनस्तमाह प्रणतं गुरुः ।।२६।।**

(मया) भव+अंतरे अत्र वा अन्नं न दत्तं न वा पुण्यं कृतम्। (वा) गो+विप्र+ग्रासः अपहृतः। पितरौ, गुरुः (वा) निन्दिताः।२२। ईशः न अर्चितः वा अतिथयः हापिताः (वा) द्विजाः धिक्कृताः। मया पितरौ त्यक्त्वा स्त्रिया साकं मिष्टान्नं भुक्तम्।२३। इति भाति। भोः (गुरो) अन्यथा ईदृक् कष्टं मयि न उपस्थितम्। (मया) अन्य+उपकारः न कृतः। (तस्मात् अहं) भू+भारः मोघभवः अभवम्।'२४। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अहं भिषक्। ते अन्नपथ्यं दिव्य+औषधं दास्ये।' इति उक्त्वा तस्मिन् (श्रीगुरौ) विरते एकः द्विजः समाययौ।२५। सायंदेव+अभिधः काञ्ची+वासी कौण्डिण्य+गोत्रजः यवन+अधीनः सुदीनः। तं प्रणतं गुरुः प्राह।२६।

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

ईश्वराचे पूजनसुद्धां केले नाही; (माध्यान्हकाळी) अतिथीला हांकलले असावे; ब्राह्मणांचा अपमान केला असावा. आईवडिलांना सोडून मी बायकोबरोबर मिष्टान्न खाल्ले असावे.२३. अहो, असे नसते तर मला हे दुर्धर दुःसह कष्ट झालेच नसते. कसलाही परोपकार न केल्याने मी भूमीला भारभूत झालो आहे. हा माझा जन्म व्यर्थ आहे.'२४. श्रीगुरु त्याला म्हणाले, 'भिऊं नकोस! मी वैद्य आहे. तुला अन्न पचावे असे दिव्य औषध मी तुला देतो. असे श्रीगुरू बोलतात तोच त्यांच्याकडे एक ब्राह्मण आला.२५. सायंदेव नांवाचा तो कौण्डिण्य गोत्रीय ब्राह्मण उत्तरकांची(कडगंची)चा राहणारा होता आणि म्लेच्छाची चाकरी करीत होता. त्या विनम्र ब्राह्मणाने श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां त्याला श्रीगुरू म्हणाले.२६.

**मर्तुमिच्छति रुग्णोऽयं व्यथितो दिव्यमौषधम् । दद्म्यस्मै त्वमपि ब्रह्मन्पथ्यं स्वाद्वन्नमर्पय ।।२७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**मासा पक्षेण वाल्पान्नं भुङ्क्त आत्यन्तिकीं व्यथाम् । स तदाप्नोत्यन्नदानाद् भवेद्धत्येति भाति मे ।।२८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भिषक्तमोऽस्मि नाशङ्क्यं सापूपं देहि माषयुक् । परमान्नं च पथ्यं मा भीर्जाने रुक्प्रतिक्रियाम् ।।२९।।**

अयं रुग्णः व्यथितः मर्तुम् इच्छति। तस्मै दिव्यं औषधं दद्मि। '(हे) ब्रह्मन्, त्वं अपि पथ्यं स्वादु अन्नं अर्पय।'२७। सायंदेवः उवाच। सः मासा पक्षेण वा अल्प+अन्नं भुङ्क्ते। तदा आत्यन्तिकीं व्यथां आप्नोति। अन्न+दानात् हत्या भवेत् इति मे भाति'।२८। श्रीगुरुः उवाच। 'भिषक्+तमः अस्मि। न आशंक्य स+अपूपं माषयुक् पथ्यं परमान्नं च देहि। मा भीः, रुक्+प्रतिक्रियां जाने।'२९।

'हा रोगी अत्यंत त्रासून मरायला निघाला आहे. मी ह्याला दिव्य औषध देतो आहे. तूंसुद्धां त्याला पथ्यकर गोड अन्न दे.'२७. सायंदेव उत्तरला, 'ह्याने महिन्या-पंधरवड्याला कधी तरी थोडेसेही अन्न खाल्ले तरी त्याला भयंकर वेदना होतात. मी अन्न दिले तर न जाणो, ह्याला कांही झाले तर मला ब्रह्महत्येचे पाप लागेल अशी मला भीती वाटते.'२८. श्रीगुरू म्हणाले, 'मी उत्तम वैद्य आहे. ईश्वरस्वरूप असल्याने श्रीगुरूंनी स्वतःला **भिषक्तम** (ऋग्वेद २:३३:४) म्हणणे योग्यच होय. मनांत कांहीही शंका न आणतां अपूप, उडदाचे वडे, पायस इत्यादींसह चारी ठाव भोजन ह्याला दे. घाबरूं नकोस, मी रोगाचा प्रतिकार उत्तम प्रकारे जाणतो.'२९. सायंदेवाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार करायचे मान्य केले आणि तो त्यांना म्हणाला, 'आपणही आपल्या शिष्यांसह माझ्या घरी येऊन भिक्षेचा स्वीकार करावा. मी आपला शिष्य होत आहे. तरी हे सद्गुरो, मी आपल्याला शरण आलो आहे, आपण मला मार्गदर्शन करा.'३०.

### ।। सायंदेव उवाच ।।

**तथा कुर्यामपि भवान्सशिष्योऽङ्गीकरोतु मे । भिक्षां गृहेऽस्मि ते शिष्यः प्रपन्नं शाधि मां गुरो ।।३०।।**
**इत्युक्तिं सौष्ठवौदार्य-रम्यां श्रुत्वा तथेति तम् । ऊचे ततः सशिष्यं तं द्विजो निन्ये निजालयम् ।।३१।।**
**चित्रितेऽलङ्कृते गेहे रंगवल्ल्यादि रञ्जिते । स्वासनेषूपवेश्यैतानुपतस्थेऽङ्गनान्वितः ।।३२।।**

सायंदेव उवाच। 'तथा कुर्याम्। सशिष्यः भवान् अपि मे गृहे भिक्षां अङ्गीकरोतु। ते शिष्यः अस्मि। (हे) गुरो, प्रपन्नं मां शाधि।'३०। इति सौष्ठव+औदार्य+रम्यां उक्तिं श्रुत्वा (श्रीगुरुः) तं 'तथा' इति ऊचे। द्विजः निजालयं निन्ये।३१। चित्रिते अलंकृते रङ्गवल्ल्यादि रंजिते गेहे सु+आसनेषु उपवेश्य अङ्गना+अन्वितः (सायंदेवः) उपतस्थे।३२।

**संन्याशाचे पूज्यत्व -** हे त्याचे औचित्यापूर्ण आणि उदार बोलणे ऐकून श्रीगुरूंनी त्याला होकार दिला. मग तो सायंदेव त्या सर्वांना आपल्या घरी घेऊन गेला.३१. नयनरम्य चित्रांनी, तोरण-पताकांनी तसेच आकर्षक रांगोळ्यांनी सजविलेल्या त्या घरी श्रीगुरूंना उत्तम आसनावर बसवून त्यांची परमेश्वरभावाने पूजा केली. श्रीगुरू साक्षात् भगवंत आहेत हे ज्ञान नसतांनाही, त्यांच्या वेदज्ञानाने, संन्यासित्वामुळे सायंदेवाच्या मनांत हे ईश्वररूप आहेत अशी बुद्धी उपजली. ही भगवद्गीतेच्या (१५:१) प्रतिपादनाशी जुळणारी आहे. ('वरती मुळे आणि खाली शाखा असलेल्या, वेद ज्याची पाने आहेत अशा अक्षय अश्वत्थाला जाणणारा वेदवेत्ता होय.') श्राद्धाच्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रांतही (२:१५) हेच सांगितले आहे. 'जेवढ्या म्हणून देवता आहेत त्या सर्व वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाच्या ठायी वसतात. त्यासाठी वेदज्ञ ब्राह्मणांना रोज नमस्कार करावा, त्यांचा आदर करावा, त्यांच्याशी अश्लील भाषण करूं नये. अशानेच देवता संतुष्ट होतात.' वित्त, दारा (पुत्र) आणि लोक या सर्वांच्या आसक्तीचा (एषणांचा) त्याग करून दण्डादि धारण करून भिक्षावृत्तीचा अंगीकार करणारा संन्यासी होतो. अशा संन्याशाला शास्त्रांनी साक्षात् विष्णूंचेच स्वरूप मानले आहे. असा यति ज्या घरी जेवतो तिथे साक्षात् विष्णूच जेवतात. ह्या ठिकाणी तर श्रीगुरू ब्रह्मस्वरूपच असल्याने हा भ्रम जरी मानला तरी संवादी भ्रमच होतो.३२.

**सूपचारैः प्रपूज्येशं रौद्रैर्मन्त्रैश्च पौरुषैः । नीराज्य श्रद्धया गीत-स्तोत्रादिभिरतोषयत् ।।३३।।**
**गुरुपादोदकं तीर्थं भक्त्या संपूज्य मुक्तिदम् । पीत्वैनोहारि सस्त्रीकः शिष्यान्सर्वानपूजयत् ।।३४।।**
**अन्नं चतुर्विधं स्वादु सुरसं गव्यसंयुतम् । प्रादात्प्रकामं सर्वेभ्यो मधुरोक्त्यादरेण सः ।।३५।।**

ईशं सु+उपचारैः रौद्रैः पौरुषैः च मन्त्रैः श्रद्धया प्रपूज्य नीराज्य गीत+स्तोत्रादिभिः अतोषयत्।३३। एनो+हारी मुक्तिदं गुरु+पाद+उदकं तीर्थं सस्त्रीकः भक्त्या संपूज्य पीत्वा सर्वान् शिष्यान् अपूजयत्।३४। सः चतुर्विधं स्वादु सुरसं गव्य+संयुतं अन्नं सर्वेभ्यो प्रकामं मुधर+उक्त्या आदरेण प्रादात्।३५।

त्याने उत्तम उपचारांनी, शतरुद्रीय आणि पुरुषसूक्त यांच्या मंत्रांनी श्रद्धापूर्वक सद्गुरूंचे पूजन केले, आरती केली आणि गीत, स्तोत्रे इत्यादींनी त्यांना प्रसन्न केले.३३. गुरुगीतेत *'शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः।'* असे गुरुचरणांच्या तीर्थाचे वर्णन आहे. अशा पापविनाशी आणि मुक्तिप्रद तीर्थाचे सपत्नीक भक्तिभराने षोडशोपचार पूजन करून सायंदेवाने ते प्राशन केले. तसेच सर्व शिष्यांचीही त्याने यथायोग्य पूजा केली.३४. यानंतर सायंदेवाने सर्वांना भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चारी प्रकारचे, दूध, दही, तूप, लोणी यांनी युक्त, मधुर अन्न आदराने आणि गोड (आर्जवी) भाषणासहित यथेच्छ खाऊं घातले. ते सहाही रसांनी चविष्ट केले होते. आयुर्वेदांत भोजन गोड असावे असे म्हटले आहे. तसेच गीतेनेही (१७:८) रसयुक्त, स्निग्ध, स्थिर आणि हृद्य आहाराला सात्त्विक म्हटले आहे. चतुर्विध अन्न - दांतानी तुकडे करून खाल्ले जाते ते अपूपादि **भक्ष्य**, न चावतां नुसते गिळले जाते ते पायसादि **भोज्य**, जिभेने चाटून खाल्ले जाणारे गूळ वगैरे **लेह्य**, दांतानी चोखून रस घेऊन नीरस भाग टाकून जे सेवन केवे जाते ते ऊस वगैरे **चोष्य**.३५.

**भुक्त्वान्नं गुरुपङ्क्त्यां स भेजे रुग्णोऽप्यनामयम । नेदं चित्रं हि यद्भक्ता घ्नन्त्युद्भवमहारुजम् ।।३६।।**
**स ततोऽसारसंसार-निर्विण्णो गुरुदर्शनात् । भूत्वा क्षणादुदासीनः सर्वतोऽभजदच्युतम् ।।३७।।**
**द्विजोऽपि भुक्तानाचान्तान्सूपविष्टान्सुगन्धिभिः । पत्सैवनैश्चास्यवासैस्तोषयित्वाऽब्रवीद्गुरुम् ।।३८।।**
**अङ्घ्र्यब्जवन्दनात्तेऽद्य सफलं जन्मकर्म मे । पितरोनुग्रहान्मुक्तास्तत्कृतार्थोऽस्मि निर्मलः ।।३९।।**

सः रुग्णः गुरु+पंक्त्यां अन्नं भुक्त्वा अनामयं भेजे। इदं चित्रं न हि यत्+भक्ताः उद्भव+महा+रुजं घ्नन्ति।३६। ततः असार+संसार+निर्विण्णः सः गुरुदर्शनात् (एव) क्षणात् उदासीनः सर्वतः अच्युतं अभजत्।३७। द्विजः अपि भुक्तान् आचान्तान्, सु+उपविष्टान् सुगन्धिभिः पत्+सेवनैः आस्य+वासैः तोषयित्वा गुरुं अब्रवीत्।३८। अद्य ते अंघ्रि+अब्ज+वंदनात् मे जन्म+कर्म सफलम्। अनुग्रहात् पितराः मुक्ताः। तत् निर्मलः कृतार्थः अस्मि।३९।

तो रोगी ब्राह्मणही श्रीगुरूंच्या पंक्तीला अन्न ग्रहण करून निरोगी झाला. श्रीगुरूंच्या पंक्तीला म्हणजे त्यांच्या शिष्यांच्या पंक्तीला असा अर्थ घ्यावा; किंवा श्रीगुरूंचे शिष्य सगळे संन्यासीच, अर्थात् गुरुस्थानीच असल्याने गुरूंची पंगत असाही अर्थ घेतां येईल. तसेच गरूंच्या पंक्तीला जेवला ह्यांत त्या रुग्णाचा समावेश श्रीगुरूंच्या शिष्यवर्गांत झाल्याचीही सूचना आहे. तो पोटशूळ बरा झाला यांत आश्चर्य कांहीच नाही; कारण श्रीगुरूंचे भक्त जन्ममरणरूपी महारोगाचाही नाश करतात.३६. केळीच्या खुंटासारख्या निस्सार संसारापासून विरक्त झालेला तो रोगमुक्त ब्राह्मण केवळ श्रीगुरूंच्या दर्शनानेच तत्काळ उदासीन झाला आणि सर्वभावे सच्चिदानंदस्वरूपापासून कधीही च्युत न होणाऱ्या सद्गुरूंचा भक्त झाला.३७. मग सायंदेव ब्राह्मणाने भोजन केरून आंचवलेल्या सर्वांना छानशा आसनांवर बसवून सुगंधी पदार्थ अर्पण केले. तसेच मुखवासही दिला. विडा (तांबूल) संन्याशांना निषिद्ध असला तरी विलायची किंवा लवंग सेवन करतां येते. मग त्याने श्रीगुरूंची प्रार्थना केली.३८. 'श्रीगुरुमहाराज! आपल्या चरणकमलांना वंदन केल्याने माझा जन्म आणि माझे सर्व कर्म सफल झाले आहेत. आपल्या कृपानुग्रहाने माझे सर्व पितरही मुक्त झाले आहेत. यामुळे आत्मज्ञानाला आड येणारी सर्व पापे नाश पावून मी निर्मल झालो आहे व मी कृतकृत्य झालो आहे.३९.

**गङ्गा पापं विधुस्तापं दैन्यं कल्पतरुर्हरेत् । वायुस्तूलमिवैतत्ते दर्शनं हरति त्रयम् ।।४०।।**
**साक्षी सर्वान्तरस्थस्त्वं परात्माऽधोक्षजोऽमलः । नृरूपेणावतीर्णोऽसि साधूंस्त्रातुमजोऽव्ययः ।।४१।।**
**देहि मे तेऽमलं दास्यं श्रद्धोपेतं कुलाय च । याचेऽदो भगवन्नेको ममाधिस्तन्निशामय ।।४२।।**
**यन्निघ्नोऽस्मि स वै हिंस्रो यवनो हन्ति भूसुरम् । प्रत्यब्दमाह्वयत्यद्य तदर्थमिति शुश्रुम ।।४३।।**

गङ्गा पापं, विधुः तापं, कल्पतरुः दैन्यं हरेत्। ते दर्शनं त्रयम् अपि वायुः तूलं इव हरति।४०। साक्षी सर्व+अंतरस्थं अधोक्षजः अमलः अजः अव्ययः त्वं साधून् त्रातुं नृ+रूपेण अवतीर्णः असि।४१। मे कुलाय च ते अमलं श्रद्धा+उपेतं दास्यं देहि अदः याचे। भगवन्, मम एकः आधिः निशामय।४२। (अहं) यत्+निघ्नः सः हिंस्रः यवनः प्रत्यब्दं भूसुरं हन्ति वै। तदर्थं अद्य (मां) आह्वयति इति शुश्रुम।४३।

गंगा पाप, चंद्रमा ताप आणि कल्पवृक्ष दैन्य दूर करतात. आपले दर्शन मात्र या तिन्हींना, वाऱ्याने कापूस उडवून लावावा, तसे पळवून लावतात.'४०. 'सर्वांच्या अंतर्यामी साक्षित्वाने राहणारा परमात्मा तूं आहेस. **अक्ष** म्हणजे नेत्रादि इंद्रियांना **अधः** म्हणजे अंतर्मुख केल्याने जो चित्तांत प्रकटतो तो अधोक्षज तूंच आहेस. रागद्वेषादि चित्ताचे मल धुऊन टाकणारा जन्ममरणादि विकाररहित अक्षय पुरुष असूनही तूं साधूच्या परित्राणाकरिता मानुष रूपाने अवतरला आहेस.४१. मला आणि माझ्या वंशाला आपले अव्यभिचारी आणि श्रद्धापूर्ण दास्य द्यावे हेच मागणे आहे. भगवंता, माझ्या मनाला एक घोर चिंता लागलेली आहे ती आपण ऐकावी.४२. माझा स्वामी असलेला क्रूर म्लेच्छ प्रतिवर्षी एका ब्राह्मणाला ठार करतो. त्यासाठीच त्याने आज मला बोलावले आहे असे आमच्या कानांवर आले आहे.४३. श्रीगुरू सायंदेवाला म्हणाले, भिऊं नकोस! तो यवन कितीही निष्ठुर असूं दे, तूं बिनधास्त त्याच्याकडे जा. तो तुझा सत्कारच करील. मग आनंदाने तूं परत ये. तोंपर्यंत मी इथेच थांबतो. चिंता सोड.४४.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**मा भीः क्रूरमपीदानीं यवनं याह्यसंशयम् । मुदैष्यस्यर्चितस्तेन तावत्तिष्ठामि मा शुचः ॥४४॥**
**इत्याकर्ण्यापशङ्कं स ययौ यवनमञ्जसा । शस्त्रैर्विप्रश्छिनत्तीति भ्रान्तोऽरं यवनस्तदा ॥४५॥**
**तं तुष्ट्वा वस्त्रभूषार्थैः प्राह गच्छ सुखं द्विज । सायंदेवोऽपि वीताधिर्हृष्टः श्रीगुरुमाययौ ॥४६॥**
**सर्पोऽप्यद्याद्विराजोऽर्भं हरेर्वेभो गुरुप्रियम् । न क्षमोऽप्यन्तको द्रष्टुं यवनः किमुताल्पकः ॥४७॥**
**दासोऽसीष्टं लभेत्ते मे द्व्यष्टाब्दैर्दर्शनं भवेत् । द्विजेत्युक्त्वा वैद्यनाथं गत्वान्तर्दध ईश्वरः ॥४८॥**

श्रीगुरुः उवाच। मा भीः। क्रूरं अपि यवनं असंशयं याहि। तेन अर्चितः मुदा एष्यसि। तावत् तिष्ठामि। मा शुचः।४४। इति आकर्ण्य सः अपशङ्कं अञ्जसा यवनं ययौ। तदा शस्त्रैः विप्रः (मां) छिनत्ति इति अरं भ्रान्तः यवनः।४५। तं वस्त्र+भूषा+अर्थैः तुष्ट्वा प्राह, (हे) द्विज, सुखं गच्छ! सायंदेवः अपि वीत+आधिः हृष्टः श्रीगुरुं आययौ।४६। विराजः अर्भं सर्पो अद्यात् अपि हरेः वा (अर्भं) इभो (अद्यात्)? गुरु+प्रियं अंतकः अपि द्रष्टुं न क्षमः। किं उत अल्पकः यवनः?४७। (हे) द्विज, (मम) दासः असि। ते इष्टं लभेत्। द्वि+अष्ट+अब्दैः मे दर्शनं भवेत्। इति उक्त्वा वैद्यनाथं गत्वा ईश्वरः अन्तर्दधे।४८।

हे श्रीगुरूंचे आश्वासनपर भाषण ऐकून तो सायंदेव निःशंक मनाने लगेच त्या यवनाकडे गेला. त्या वेळी त्या यवनाला अशी गाढ भ्रांती झाली की एक ब्राह्मण आपले शस्त्राने तुकडे करतो आहे.४५. त्यामुळे प्रभावित होऊन त्याने सायंदेवाला वस्त्रे, अलंकार आणि द्रव्य देऊन सन्मानित केले आणि म्हणाला, अहो विप्रवर, आपण सुखाने घरी जा. त्याबरोबर मरणभय दूर झाल्याने हरखलेला सायंदेव श्रीगुरूंकडे परतला.४६. गरुडाच्या पिलाला कदाचित् सापही खाऊं शकेल किंवा सिंहाच्या छाव्याला हत्तीही गिळेल; परंतु गुरुभक्ताकडे पाहण्याचीही साक्षात् यमाचीही बिशाद नाही. मग त्या क्षुद्र यवनाची काय कथा?४७. यवनाकडून परतलेल्या सायंदेवाची आपल्याबरोबर येण्याची उत्सुकता जाणून श्रीगुरू म्हणाले, हे ब्रह्मश्री, तूं माझा दास आहेस. तुला तुझे अभीप्सित मिळेल. आणखी सोळा वर्षांनी तुला माझे

**ईदृश्योऽलौकिका लीलाः कृता भक्तिविधित्सया । भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु ।।४९।।**
**लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः । लौकिकानन्दजनकां चमत्कृतिमिहाकरोत् ।।५०।।**
**हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम् । भजनादेव निर्धूत-मला यान्ति मुमुक्षुताम् ।।५१।।**
**ततोऽभ्यासाच्च वैराग्यात्तं ध्यायन्त उपासते । महाप्रसादोऽनेनैव लभन्ते सद्गुरोर्नताः ।।५२।।**

ईदृश्याः अलौकिकाः लीलाः भक्ति+विधित्सया कृताः। कथं अपि लोका मां भजेयुः इति तु अस्य आशयः।४९। अनेन हेतुना तत् लोका भगवत्+पदं भजन्ति। भजनात् एव निर्धूत+मलाः मुमुक्षुतां यान्ति।५०। लोके प्रति+उपकारित्वं समीक्ष्य भगवान् विभुः इह लौकिक+आनंद+जनकां चमत्कृतिं अकरोत्।५१। ततः अभ्यासात् वैराग्यात् च तं ध्यायन्तः उपासते। अनेन एव नताः सद्गुरोः महाप्रसादः लभन्ते।५२।

दर्शन होईल. असे आश्वासन त्याला देऊन श्रीगुरू (परळी) वैद्यनाथाला जाऊन गुप्तपणे राहिले.४८. अशा अलौकिक दिव्य लीला श्रीगुरूंनी भक्तिमार्गाच्या संस्थापनेसाठी केल्या. त्यांचा हेतु हाच की स्नेहाने वा लोभाने, कशाही प्रकारे लोकांनी आपली भक्ती करावी.४९. आपल्या (भगवंताच्या) भजनावीण लोकांना मोक्षाची योग्यता येणार नाही; आणि त्यांना तर भजनांत अजिबातच रस नाही. त्यामुळे त्यांच्या सांसारिक इच्छा पुरवून त्यांच्यांतील प्रत्युपकाराची भावना जागवावी आणि अशा रीतीने तरी त्यांना आपल्या भक्तीला लावावे यासाठीच त्यांना सुखविणारे चमत्कार तो सर्वव्यापी भगवंत करीत असतो.५०. या निमित्ताने ते लोक सगुण परमात्म्याची अर्चन, वन्दन (*श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।*) आदि नऊ प्रकारे (१) **सकाम भक्ती** करतात. या भक्तीच्या प्रभावाने त्यांच्या चित्तांतील मल नाहीसे होऊन त्यांच्या ठिकाणी मुक्तीची इच्छा (२. **मुमुक्षा**) निर्माण होते.५१. त्यानंतर मुक्तीसाठी प्रयत्नशील झालेला तो (३) **साधक** अभ्यास आणि वैराग्य धारण करून त्या भगवंताचे चिंतन करीत त्याची उपासना करतो. उपासना याचा अर्थ तत्परता. संसारांत जसे आपण ‘मी येतो, मी

**ऐक्यज्ञानं तदा लब्ध्वा महावाक्येन चात्मनोः । शान्तिं विनिहिताविद्यास्तत्संस्थां यान्ति ते ध्रुवाम् ।।५३।।**
**प्रसन्नात्मानः प्रशान्ता निर्बन्धा द्वैतवर्जिताः। स्वात्मारामाश्चरन्त्यत्र जडोन्मत्तपिशाचवत् ।।५४।।**

तदा ते महावाक्येन च ऐक्यज्ञानं लब्ध्वा वि+नि+हता+अविद्याः तत्+संस्थां ध्रुवां शान्तिं यान्ति।५३। द्वैतवर्जिताः निर्बन्धाः प्रसन्न+आत्मानः प्रशांताः स्वात्मारामाः अत्र जड+उन्मत्त+पिशाच+वत् चरन्ति।५४।

जातो, हा माझा देह आहे, हे माझे घर आहे' असा सतत आस्थेने व्यवहार करतो आणि मग त्याचाच अध्यास दृढ होत जातो. त्याचप्रमाणे जर 'मी ब्रह्म आहे' अशी आस्था निरंतर ठेवून त्याचप्रमाणे व्यवहार करण्याचा अभ्यास करणे हीच उपासना. ह्या उपासनेने आपण देह आहोत अशा ज्ञानाचा निरास करणारे (देहात्मज्ञानबाधक), देहात्मज्ञानासारखे 'मी ब्रह्म आहे' असे आत्मज्ञान सुलभ होते. ह्याच **उपासने**ने (४) सद्गुरूंचा महाप्रसाद होतो.५२. म्हणजेच शब्दज्ञान आणि अपरोक्षज्ञान यांत निष्णात असलेले कृपासागर सद्गुरू महावाक्याचा उपदेश (५. **श्रवण**) करतात. 'तो तूं आहेस' या महावाक्यातील भागत्यागलक्षणेच्या लक्षित अर्थाच्या अनुसंधानात्मक (५) **मनना**ने आणि (६) **निदिध्यासना**ने अविद्येचा तिच्या कार्यासहित (प्रपंचासहित), विशेष (**वि**) आणि (**नि**) समूळ नाश (**हता**) करून साधक-भक्त प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अखंडरस ऐक्य अनुभवतो. म्हणजेच अपरोक्षज्ञानाच्या प्राप्तीने स्वात्मरूपांत विलीन होतो. आणि त्या आत्मज्ञानांतील पुनरावृत्तिरहित, निर्वाणलक्षण शांती पावतो. निरतिशय आनंदघन चैतन्यांत निरंतर डुबून राहतो.५४.

शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यांत (१:१:४) स्पष्ट केल्याप्रमाणे ब्रह्मभावांत स्थिरावल्यावर तो पूर्वीसारखा संसारी राहत नाही; पूर्वीसारख्या संसारी माणसाला ब्रह्मज्ञान झालेले नसते. जीवन्मुक्ताला आपले असे कुणी राहत नाही वा तो कुणाचाही राहत नाही. यावर कुणी म्हणतील की, 'मग लौकिक, वैदिक सर्वच कर्मांचा लोप होऊन त्याला प्रत्यवाय

दोष लागणार नाही का?' पण त्याला 'मीच ब्रह्म आहे' असा आनंदपूर्ण अद्वैत बोध झाला असल्याने तो कृतकृत्य होतो (परमहंसोपनिषत् ९). आत्मा आणि परमात्मा यांच्या एकत्वाच्या ज्ञानाने होणारा भेदाचा भंग हीच संध्या तिचे आत्मसमाधीतच आचरण करावे असे उपनिषदाचे प्रतिपादन आहेत. श्रीमद्भगवद्गीतेतही (३:१७) म्हटलेले आहे, जो आत्म्यांतच रमलेला आहे आणि आत्मानंदाने तृप्त होऊन आत्म्यामध्येच संतुष्ट आहे त्याला कांहीही करावयाचे राहत नाही.' योगवासिष्ठांतच (५:७७:२९) जीवन्मुक्ताची लक्षणे सांगतांना सूर्य शीतल झाला, चंद्रमंडल उष्ण झाले किंवा अग्नीच्या ज्वाळा खालच्या दिशेने जरी पसरल्या तरी जीवन्मुक्ताला आश्चर्य वाटत नाही असे सांगितले आहे. *('अपि शीतरुचावर्के उष्णे पीयूषमण्डले। अप्यधःप्रसरत्यग्नौ जीवन्मुक्तो न विस्मयी।।')* साहजिकच तो इतरांना जड (मंदमति), उन्मत्त (वेडा) किंवा पिशाच यांच्यासारखा वाटतो. वर वर्णन केल्यानुसार त्याच्या मनांतील द्वैतभावच लोपलेला असल्याने ज्ञानाच्या पूर्वीचे प्रापंचिक व्यवहार लोप पावतात.

*'योगभूमिः - शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता। विचारणा द्वितीया स्यात्तृतीया तनुमानसा। सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यादसंसक्तस्तु पञ्चमी। पदार्थाभावनी षष्ठी सप्तमी तुर्यका स्मृता। आद्यत्रयं जागरतं साधकस्य प्रकीर्तितम्। तुर्या स्वप्नः साधकोऽत्र प्राज्ञैर्ब्रह्मवदुच्यते। निद्रा तु पञ्चमी ब्रह्मवद्वरोऽत्र उच्यते। षष्ठी तु गाढनिद्रा स्याद्वरीयानत्र स स्मृतः। ज्ञेयं परत उत्थानमस्य भावितचेतसः। अन्त्या तुरीयात्र ब्रह्मवद्वरिष्ठो महामतः। स्वतो वा परतो वाऽस्य व्युत्थानं नैव कर्हिचत्, इति।'*

**योगभूमिका -** यांनाच ज्ञानभूमिका असेही म्हणतात, योगवासिष्ठाच्या उत्पत्तिप्रकरणांत ११८व्या सर्गांत वर्णिलेल्या आहेत. क्षणभंगुर, आभासमात्र, पराधीन ऐंद्रिय उपभोगांचा वीट येऊन नित्य, शाश्वत, निरतिशय आणि स्वतंत्र अशा स्वात्मसौख्याची इच्छा होणे आणि त्यासाठी शास्त्र आणि सतंसंग यांच्याकडे प्रवृत्ती होणे ही (१) **शुभेच्छा** नांवाची

पहिली ज्ञानभूमिका होय. इंद्रियांपासून विरक्त होऊन शास्त्रांचा अभ्यास करणे, सज्जनांच्या संगतीत सदाचारपूर्वक श्रवण-मनन घडूं लागले की दुसरी (२) **विचारणा** नांवाची भूमिका सिद्ध झाली असे समजायला हरकत नाही. या दोन भूमिकांचा अभ्यास प्रगाढ होऊन इंद्रिये विषयापासून परावृत्त होऊं लागली, अनासक्ती मनांत स्थिरावली की तिसरी (३) **तनुमानसा** ही भूमिका प्राप्त होते. पहिल्या तीन भूमिकांत साधकाची जागृतावस्था असते. त्याला बाह्य जगताचे पूर्ण भान असते. या तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासाने विषयांपासून पूर्णपणे विरक्त झालेले मन (वशीकरणसंज्ञा वैराग्य) सच्चिदानंद आत्मस्वरूपांत स्थिर झाले की चौथ्या (४) **सत्त्वापत्ती** नांवाच्या भूमिकेवर योगी आरूढतो. ह्या भूमिकेतील योगी ब्रह्मवित् (ब्रह्मज्ञानी) म्हणविला जातो. ह्या तुर्या किंवा समाधी अवस्थेत साधकाला बाह्य जग स्वप्नवत् होते. ही ब्रह्मज्ञानाची पहिली अवस्था आहे. या चार भूमिकांच्या दृढ अभ्यासाने साधक आत्मस्वरूपांत रमून जातो आणि बाह्य जगताचे त्याला भान नसते. हीच पांचवी (५) **असंसक्ती** भूमिका आहे. ही साधकाची निद्रा आहे. ह्या योग्याला ब्रह्मविद्वर असे म्हणतात. सहाव्या भूमिकेत योगी बाह्य जगताचा संबंध संपूर्णपणे तुटल्याने योग्याला जगांतील पदार्थांचे भान राहत नाही. ह्या (६) **पदार्थाभावनी** स्थितीतील योग्याला (**ब्रह्मविद्वरीयान्**) समाधीतून उठविण्यासाठी दुसऱ्या कुणाच्या तरी प्रयत्नांची आवश्यकता असते (**परतो व्युत्थान**). यानंतरची चरम ज्ञानभूमिका (सातवी किंवा ज्ञानी पुरुषांची चौथी श्रेणी - **तुरीया**) प्राप्त झालेला योगी अखंड समाधीत मग्न असतो. तिच्यांतून तो स्वतःच्या वा दुसऱ्याच्या प्रयत्नांनीही भानावर येत नाही. हा ब्रह्मविद्वरिष्ठ होय.

**स्पर्शेक्षाकीर्तनादीनां सद्गुरोर्महिमा त्वियान् । स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वापि धत्ते यत्र मनोऽचलम् ।।५५।।**
**तत्सारूप्यं स पेशस्कृद्ध्यानात्कीट इवैत्यरम । इत्याद्या मार्गणोपाया हरेः स्युः सुलभा नृणाम् ।।५६।।**
**मृग्योऽसौ पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः । नानुमानैरतो युक्त आत्मैवात्मगुरुः किल ।।५७।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भूतेशोऽन्तर्दधे कस्मात्तेजस्वी भक्तवत्सलः । शिष्यास्तस्थुस्तदा कुत्र तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।५८।।**

सद्गुरोः स्पर्श+ईक्षा+कीर्तन+आदीनां इयान् महिमा। स्नेहात् द्वेषात्, भयात् वा अपि यत्र मनः अचलं धत्ते।५५। स पेशस्कृत्+कीट इव तत्+सारूप्यं एति। इति+आद्याः हरेः मार्गण+उपायाः नृणां सुलभाः।५६। असौ पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः। न अनुमानैः। अतः आत्मा एव आत्म+गुरुः युक्तः किल।५७। नामधारक उवाच। तेजस्वी भक्तवत्सलः भूतेशः कस्मात अन्तर्दधे? तदा शिष्याः कुत्र तस्थुः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।५८।

एवढा सद्गुरूंच्या स्पर्श, दर्शन, कीर्तन इत्यादिकांचा महिमा आहे. व्रजगोपिकांप्रमाणे प्रेमाने, शिशुपालादिकांप्रमाणे द्वेषाने किंवा कंसादींप्रमाणे भयाने जिथे कुठे कुणीही अभ्यास-वैराग्यांनी मन स्थिर करील,५५. त्याला ध्येय वस्तूचे सारूप्य प्राप्त होते. कुंभारीण माशीच्या चिंतनाने जसे अळीलासुद्धां पंख फुटून तिची कुंभारीण माशीच होते तसेच हे आहे. असे हे परमात्म्याच्या प्राप्तीचे उपाय मानवमात्रांना सहज उपलब्ध आहेत. यासाठी जाती, वय, लिंग इत्यादींचा कांही नियम नाही.५६. ह्या भगवंताचा नरजन्मांतच बुद्धी इत्यादि साधनांनी शोध घ्यायचा आहे. मात्र केवळ तर्काने तो सांपडणार नाही. यासाठी आपणच आपले गुरू असतो हे खरोखर योग्यच आहे.५७. नामधारक विचारतात - तेजःपुंज आणि भक्तवत्सल असे भगवान कां बरे गुप्त झाले? आणि मग शिष्यवर्ग कुठे राहिला? हे सर्व जाणण्यास मी सादर आहे.५८.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सर्वे शिष्या भविष्याम इति मत्वात्र यान्त्यतः । मत्वा स्थेयं रह इति छात्रान्सद्गुरुरब्रवीत् ।।५९।।**
**लब्ध्वा द्विजत्वं संस्कारैर्ब्रह्मचारी पठन्त्रयीम् । द्वादशाब्दं कृती सूत्र-मेखलाजिनदण्डधृक् ।।६०।।**
**सायं प्रातः स कर्माग्नि-कार्यं भिक्षां चरन्गुरुम । भजन्भक्त्याऽस्वपन्नह्नि याचितां गुरवेऽर्पयन् ।।६१।।**
**तद्दत्तभुग्लब्धविद्यः स्नायाद्दत्वा वरं व्रती । अनाश्रमी न तिष्ठेत भवेत्स प्रत्यवाय्यतः ।।६२।।**

सिद्ध उवाच। 'सर्वे शिष्या भविष्यामः इति मत्वा अत्र यान्ति अतः रह स्थेयं' इति मत्वा सद्गुरुः छात्रान् अब्रवीत्।५९। संस्कारैः द्विजत्वं लब्ध्वा ब्रह्मचारी कृती सूत्र+मेखला+अजिन+दण्ड+धृक् द्वादश+अब्दं त्रयीम् पठन्।६०। तत्+दत्त+भुक् लब्ध+विद्या व्रती वरं दत्वा स्नायात्। अनाश्रमी न तिष्ठेत। सः प्रत्यवायी भवेत्।६१। सः सायं प्रातः कर्म, अग्नि+कार्यं, भिक्षां चरन् गुरुं भक्त्या भजन्, अह्नि अस्वपन्, याचितां (भिक्षां) गुरवे अर्पयन्।६२।

केवळ आपल्या भजनानेच शिष्याचा उद्धार करण्याचे सामर्थ्य असूनही परंपरेचे रक्षण करण्यासाठी तसेच शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी भगवंत गुप्त झाले हे स्पष्ट करण्याच्या हेतूने सिद्धमुनी उत्तर देतात. 'सगळे - अधिकारी आणि अनधिकारीही, 'आपणही शिष्य होऊं' या अशा विचाराने आपल्याकडे येतील तरी एकांतवास स्वीकारावा' असा विचार करून सद्गुरू शिष्यांना म्हणाले.५९.

**ब्रह्मचर्याश्रम -** कर्मकांडांत पुढे सांगण्यांत येणाऱ्या कर्मांनी द्विजत्व प्राप्त करून यज्ञोपवीत (जानवे), मेखला (कडदोरा), कृष्णाजिन आणि दंड धारण करणाऱ्या कुशल ब्रह्मचाऱ्याने बारा वर्षे ऋक्, यजु आणि साम या वेदत्रयीचे पठण करावे. त्रयी या स्त्रीलिंगी शब्दाचा अमरकोशांत (१:६:३) हाच अर्थ दिला आहे.६०. अशा रीतीने सद्गुरूंच्याकडून विद्या संपादन केल्यावर त्यांना गुरुदक्षिणा देऊन समावर्तन करावे. आश्रमाविरहित राहू नये; कारण त्याने प्रत्यवाय दोष लागतो.६१. त्याने सकाळ-संध्याकाळ संध्यावंदनादि नित्यकर्मे, अग्निसाठी समिधा आणणे इत्यादि कर्मे तसेच भिक्षा यांचे आचरण करावे, दिवसां झोपू नये आणि आणलेली भिक्षा गुरूंना अर्पण करावी.६२.

**स्नातकस्तूद्वहेद् भार्यां गृह्यं परिचरेद् गृही । पोष्यभृद्यज्ञकृद्वेद-शास्त्रधर्मपरो भवेत् ॥६३॥**
**पुत्रार्पितश्रीर्भार्यायुगग्राम्यविषयो वने । यतात्माऽकृष्टपच्याशी यावच्छुद्ध्यन्तरं वसेत् ॥६४॥**
**स्वारोपिताग्निः स वान-प्रस्थो भार्याज्ञयाऽममः । प्रव्रजेद्यतिधर्मज्ञो विरक्तस्तु कुतोऽपि हि ॥६५॥**

स्नातकः तु भार्यां उद्वहेत्। गृही गृह्यं परिचरेत्। पोष्य+भृत् यज्ञ+कृत् वेद+शास्त्र+धर्म+परः भवेत्।६३। पुत्रार्पित+श्रीः भार्या+युक् अग्राम्य+विषयः यतात्मा अकृष्ट+पच्य+आशी यावत् शुद्धि+अन्तरं वने वसेत्।६४। सः वानप्रस्थः स्व+आरोपित+अग्निः भार्या+आज्ञया अममः यति+धर्मज्ञः प्रव्रजेत्। विरक्तः तु कुतः अपि।६५।

**गृहस्थाश्रम -** विद्येत न्हालेला किंवा व्रताने शुद्ध झालेला किंवा दोन्ही तो स्नातक. सोडमुंज झाल्यावर भार्येचे पाणिग्रहण करावे. इथे 'तु' शब्दाने गृहस्थाश्रम ऐच्छिक असल्याचे सुचविलेले आहे. सामर्थ्य असेल तर नैष्ठिक ब्रह्मचर्य स्वीकारावे अशा अर्थाचे स्मृतिवचन आहे. गृहस्थाने आपल्या गृह्यसूत्रानुसार धर्माचरण करावे. यांत अग्निपरिचर्येचाही समावेश जाणावा. मुंडकोपनिषदांत (१:२:३) सांगितल्याप्रमाणे, अग्निहोत्र, दर्श, पौर्णिमास, आग्रयण, चातुर्मास, वैश्वदेव इत्यादि होम न करणाऱ्या किंवा विधीशिवाय होम करणाऱ्या आणि अतिथींचा सत्कार न करणाऱ्याचे सातही लोक नाश पावतात. याच अभिप्रायाने गृहस्थाने पोष्यांचे पोषण करावे आणि यज्ञांचे अनुष्ठान करावे असे म्हटले आहे. त्याने वेद आणि शास्त्रांत पुरस्कारलेल्या धर्माचे परिपालन करावे. कर्मकांडांत हा विषय अधिक स्पष्ट होणारच आहे.६३. **वानप्रस्थाश्रम -** गृहस्थाश्रमाचा समारोप करून सर्व संपत्ती पुत्राला देऊन, भार्येसह किंवा एकट्यानेच ग्राम्य विषयांचा त्याग करून, मनाचे नियमन करून, शेतीतून पिकवलेल्या धान्याशिवाय इतर आहार ग्रहण करून चित्तशुद्धी होईपर्यंत वनांत राहावे.६४. **संन्यासाश्रम -** (चित्तशुद्धीनंतर) त्या वानप्रस्थाने अग्नीचा समारोप करून भार्येच्या संमतीने निर्मम होऊन यतिधर्माचे ज्ञान करून घेऊन संन्यास ग्रहण करावा. यति म्हणजे इंद्रियांवर विजय मिळवलेला. हा क्रम वैराग्याच्या अभावी सांगितलेला आहे. वैराग्य उत्पन्न झाले तर ब्रह्मचर्याश्रमांतून किंवा गृहस्थाश्रमांतूनही संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. ज्या दिवशी विरक्ती उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास घ्यावा असे जाबालोपनिषदाचे (४) वचन आहे. हि शब्दाच्या योजनेतून आचार्यादिकांच्या उदाहरणावरून हे प्रसिद्धच असल्याचे सुचविले आहे.६५.

**त्रिकालस्नायी संन्यासी न्यस्तसूत्रशिखैषणः । जपभिक्षाटनध्यान-शौचार्चनरतो वशी ।।६६।।**
**स्त्रीकथालौल्ययानाहः-स्वापखट्वाऽस्पृगात्मदृक् । सद्वेणुमृद्दार्वलाबु-मयभाजनदण्डधृक् ।।६७।।**
**सकृदह्न्याप्तसद्भिक्षा-भुक्शान्तस्तत्त्वचिन्तकः । तीर्थान्यटन्नृते वर्षास्त्र्यहमेकस्थले वसन् ।।६८।।**
**स्थिरीकृतमनाः क्वापि ततस्तिष्ठन्सुखी भवेत् । अशक्तस्तु महाक्षेत्रे हरिं ध्यायन्वसेत्सदा ।।६९।।**

त्रिकालस्नायी संन्यासी। न्यस्त+सूत्र+शिखा+एषणः जप+भिक्षा+अटन+ध्यान+शौच+अर्चन+रतः वशी।६६। स्त्रीकथा+ लौल्य+यान+अहः+स्वाप+खट्वा+अस्पृक् आत्म+दृक् सत्+वेणु+मृत्+दारु+अलाबु+मय+भाजन+दण्ड+धृक् ।६७। सकृत्+अह्नि+ आप्त+सत्+भिक्षा+भुक् शान्तः तत्त्व+चिन्तकः वर्षाः ऋते तीर्थानि अटन् त्रि अहं एक+स्थले वसन्।६८। स्थिरी+कृत+मनाः ततः क्व अपि तिष्ठन् सुखी भवेत्। अशक्तः तु हरिं ध्यायन् सदा महाक्षेत्रे वसेत्।६९।

तीन वेळां स्नान करण्याचा नियम कुटीचक आणि बहूदक यांना लागूं आहे. हंस संन्याशाने एकदांच स्नान करावे आणि परमहंसाला कांहीच नियम नाही (नारदपरिव्राजक उ. ४:२३). संन्यासाचे दोन प्रकार - पहिला विद्वत्संन्यास आणि दुसरा विविदिषासंन्यास. जानवे, शेंडी आणि तीन एषणांचा त्याग केल्याने होणाऱ्या विविदिषा संन्यासाने कृतकृत्यता प्राप्त होते. म्हणून त्याचे धर्म पुढे सांगितले आहेत. जितेंद्रिय होऊन प्रणवाचा जप, भिक्षा, संचार, ध्यान, शौच आणि देवपूजा ह्या कर्मात त्याने निमग्न राहावे.६६. स्त्रियांच्या गोष्टी, इंद्रियांचे लाड, वाहन, दिवसा झोप आणि खाट (पलंग) यांना स्पर्शही करू नये. आत्म्याच्या चिंतनात राहावे. चांगल्या वेळूचा, मातीचा, लांकडाचा किंवा भोपळ्याचा कमंडलु तसेच दंड धारण करावा.६७. दिवासांतून एकच वेळ मागून आणलेली शुद्ध भिक्षा ग्रहण करावी. माधुकरी, तात्कालिक, किंवा अयाचित यांसारखी भिक्षा चांगली समजावी. पावसाळ्याचे दिवस सोडून (चातुर्मास, आषाढ शुद्ध पौर्णिमा ते भाद्रपद शुद्ध पौर्णिमा हे दोन महिने संन्याशांचा चातुर्मास असतो.) सतत तीर्थयात्रा करावी. एका गांवी तीन दिवसांपेक्षां अधिक राहूं नये.६८. मन स्थिर झाल्यावर - निर्बीजसमाधीची प्राप्ती झल्यानंतर मग कुठेही राहून सुखी व्हावे. **सुखी** म्हणजे बुद्धिग्राह्य अतींद्रिय स्वात्मसौख्यांत रमून राहावे. अशक्ताने मात्र सतत ईश्वराचे ध्यान करीत काशी आदींसारख्या महाक्षेत्रांत राहावे.६९.

**तस्मात्कृध्वं स्वाश्रमार्हं कृत्यं पातोऽन्यथा भवेत् । इत्युक्त्वान्यान्प्रेरयित्वा गृहेभ्योऽजोऽब्रवीद्यतीन् ।।७०।।**
**काशी प्रयागो गया च श्रीरङ्गः पुरुषोत्तमः । श्रीशैलो नैमिषारण्यं कुरुक्षेत्रं बदर्यपि ।।७१।।**
**गोकर्णः शङ्खकर्णश्च काञ्च्ययोध्या च गोकुलम् । मथुरा द्वार्वती मायावंतिका करवीरपूः ।।७२।।**
**गन्धर्वपूर्हरिहर-क्षेत्रं सद्देवकन्यका । गुहाश्रमः सेतुबन्ध इत्यादिक्षेत्रविस्तरः।।७३।।**

तस्मात् स्व+आश्रम+अर्हं कृत्यं कृध्वम्। अन्यथा पातः भवेत्। इति उक्त्वा अन्यान् गृहेभ्यो प्रेरयित्वा अजः यतीन् अब्रवीत्।७०। काशी, प्रयागः, गया च श्रीरङ्गः, पुरुषोत्तमः, श्रीशैलः, नैमिषारण्यं, कुरुक्षेत्रं, बदरि अपि;।७१। गोकर्णः, शङ्खकर्णः, काञ्ची, अयोध्या, च गोकुलम्, मथुरा, द्वार्वती, माया, अवंतिका, करवीरपूः,।७२। गन्धर्वपूः, हरिहर+क्षेत्रं, सत्+देवकन्यका, गुहाश्रमः, सेतुबन्धः इत्यादि क्षेत्रविस्तरः।७३।

हे सर्व आपापल्या आश्रमाला योग्य असे कर्म तुम्ही सर्वांनी करावे. अन्यथा प्रत्यवायाचा दोष लागून अधःपात होतो, असे जन्मादिविकारातीत श्रीगुरूंनी सर्वांना सांगून आपापल्या घरी त्यांना पाठविले. याला प्रमाण म्हणून मनुस्मृतीचा पुढील श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. *'अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसज्जञ्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति*।।११:४४।।' (विहित कर्माचा त्याग करून विषयांच्या आसक्तीने निंद्य कर्म आचरणारा पुरुष पतन पावतो.) इतर सर्व आश्रमांतील पतितांना प्रायश्चित्ताने शुद्धी होऊ शकते. संन्यासाश्रमांतून पतन पावलेल्याला मात्र प्रयत्नाने कदाचित् आमुष्मिकी (परलोकांत) शुद्धी असली तरीही इहलोकांत प्रायश्चित्ताचे विधान कुठेही शास्त्रांत सांपडत नाही. तो देहाने आमरण अशुद्धच राहतो. शास्त्र आणि रूढी या दोन्ही पक्षी तो बहिष्कृतच ठरतो (ब्रह्मसूत्र ३:४:४३). त्याचप्रमाणे नैष्ठिक ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेल्यालाही प्रायश्चित्त नाही (अत्रिस्मृति ८:१६). त्यालाही कदाचित् आमुष्मिकी शुद्धी असेलही; पण शास्त्रदृष्ट्या भ्रष्ट झाल्याने व त्यासाठी दैहिक प्रायश्चित्ताचे विधान नसल्यामुळे तो पतितच राहतो (ब्रह्मसूत्र ३:४:४१). खालच्या आश्रमांतून वरच्या आश्रमांत चढतां येते;

**गङ्गासरस्वत्यर्कोत्था विपाट्पौष्णी मरुद्वृधा । वितस्तासिक्न्यनेकास्या चन्द्रभागा पयस्विनी ।।७४।।**
**शरावती मधुमती रेवा गोदाऽमरोद्भवा । सरयू कौशिकी पूर्णा भीमा कृष्णा मलापहा ।।७५।।**
**कावेरी प्रवरा तुङ्गा क्षिप्रा तापी च वेदिका । चर्मण्वती गण्डकीति पूर्वा नद्यो नदा अपि ।।७६।।**
**तत्संगमा अप्यघघ्नास्तीर्थान्यन्यान्यनेकशः । तीर्थानि गुरुसंचाराच्छश्वद्द्वादशसिन्धुषु ।।७७।।**

गङ्गा, सरस्वती, अर्क+उत्था, विपाट्, पौष्णी, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी, अनेकास्या, चन्द्रभागा, पयस्विनी।७४। शरावती, मधुमती, रेवा, गोदा, अमर+उद्भवा, सरयू, कौशिकी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलापहा।७५। कावेरी प्रवरा, तुङ्गभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इतिपूर्वा नद्यः, नदा अपि।७६। तत् संगमा अपि अघघ्नाः अन्यानि अनेकशः तीर्थानि। गुरु+संचारात् द्वादश सिन्धुषु,।७७।

पण वरच्या आश्रमांतून खालच्या आश्रमांत उतरतां येत नाही. निम्न आश्रमांत अवरोहण करण्याला आसक्तीच कारण आहे. ही आसक्तीच मिथ्या ज्ञानांतून उद्भवलेली असल्याने निषिद्ध आहे (ब्रह्मसूत्र ३:४:४०). नंतर ते आपल्या संन्यासी शिष्यांना तीर्थांचे परिभ्रमण करायला सांगतात.७०.

**तीर्थयात्रा -** काशी, प्रयाग, गया, श्रीरंगपट्टण, पुरुषोत्तम, श्रीशैल्य, नैमिषारण्य, कुरुक्षेत्र, बदरिनाथ, गोकर्ण, शंखकर्ण, कांची, अयोध्या, गोकुळ, मथुरा, द्वारका, हरिद्वार, उज्जैन, कोल्हापूर, गाणगापूर, हरिहर, कन्याकुमारी, कार्तिकस्वामी, रामेश्वर आणि इत्यादि शब्दांतून प्रभास, सिद्धपूर आदि क्षेत्रांचा निर्देश समजावा.७१-७३. गंगा, सरस्वती, यमुना, व्यास (बियास), रावी, मरुवर्मन, झेलम, चिनाब, सहस्रमुखी, चन्द्रभागा, पयस्विनी,७४. शरावती, मधुमती, गोदा, अमरजा, शरयू, कोसी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलप्रभा,७५. कावेरी, प्रवरा, तुंगभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इत्यादि नद्या आणि शोणभद्रादि नदसुद्धां (समुद्राला न मिळतां भूमीवरच संपणारे जलप्रवाह).७६. तसेच त्यांचे संगमही पापनाशक आहेत. पुष्कर, मानस, बिन्दु अशी इतर अनेक तीर्थे आहेत. गुरूच्या संचारानुसार तीर्थे बारा नद्यांत वास करतात. सिंहेला गुरू असतांना गोदावरी, कन्येला असतां कृष्णा, तुळेला असतां मलप्रभा, इत्यादि.७७.

**प्रचरन्ति सदा तास्तु स्वर्णदीस्नानपुण्यदाः । कृध्वं स्नानादि विधिवत्सर्वत्रात्र सरःस्वपि ।।७८।।**
**ग्रीष्मे रजस्वला नद्यो यद्दिनेऽम्बु नवं तदा । दशाहं नर्ते तीरस्थैः स्नानं मुख्यासु तु त्र्यहम् ।।७९।।**
**द्युरात्रमपि कूपादौ चरित्वैवं ततोऽखिलाः । श्रीशैलं बहुधान्येऽब्दे यात यास्याम्यहं ह्यपि ।।८०।।**

तीर्थानि प्रचरन्ति। तदा तु ताः स्वर्णदी+स्नान+पुण्यदाः। अत्र सर्वत्र सरःसु अपि विधिवत्, स्नानं कृध्वम्।७८। ग्रीष्मे यत् दिने अम्बु नवं तदा नद्यः रजस्वलाः। ऋते तीरस्थैः दशाहं, मुख्यासु त्र्यहं स्नानं न (कार्यम्)।७९। कूपादौ अपि द्युरात्रम्। एवं चरित्वा ततः अखिलाः बहुधान्ये अब्दे श्रीशैलं यात। हि अहं अपि यास्यामि।८०।

(**अर्कोत्था** = यमुना, **विपाट्**(श्) = बियास; **पौष्णी** (पुरुष्णी) = रावी; **मरुद्वृधा** = मरुवर्मन; **वितस्ता** = झेलम; **असिक्नी** = चिनाब; **कौशिकी** = कोसी)

त्या काळांत त्या नद्यांत स्नानाचे पुण्य गंगास्नानापेक्षांही अधिक आहे. ह्या सर्व तीर्थांत तसेच निरनिराळ्या सरोवरांतही सर्वांनी विधिपूर्वक स्नान, दान, श्राद्ध, ब्राह्मणभोजनादि कर्मे करावीत. महानदी आणि महाक्षेत्रांच्या ठिकाणी क्षौर करावे. सर्वत्र करण्याची आवश्यकता नाही.७८. आषाढ महिन्यांत जेव्हां नदीला नवीन पाणी येईल त्या वेळी त्या दहा दिवस रजःस्वला होतात. त्या काळांत तीरस्थांखेरीज इतरांनी दहा दिवस नदीवर स्नान करूं नये. महानदीसाठी हा काळ फक्त तीनच दिवसांचा आहे. कांही जणांच्या मते महानदींना रजस्वलत्व नाही.७९. आड, विहीर, तलाव इत्यादींनाही दोन दिवसांचे रजस्वलत्व पाळावे. अशी सर्व तीर्थयात्रा पूर्ण करून, 'बहुधान्य संवत्सराला सर्वांनी श्रीशैल्याला यावे. आपणही त्या वेळी तिथे येऊं' असे श्रीगुरूंनी सर्वांना सांगितले.८०. अशा रीतीने सर्व शिष्यवर्गांना तीर्थयात्रेला जाण्याची आज्ञा श्रीगुरूंनी केली आणि तेही त्यानुसार निघून गेले. मी मात्र श्रीगुरुचरणकमलांचा भ्रमर होऊन तिथेच राहिलो.८१.

**इत्युक्त्वा प्रेरयामास यात्राया अपि ते ययुः । तत्रैव सद्गुरुपद-पद्मालिरभवं त्वहम् ।।८१।।**
**(क्षेपकौ) यद्वर्जुनाभ्यां विद्योगौ प्राहैष प्राग्यथा तथा । गुह्यौ मे प्राह ते शिष्य विनीत कथयामि ते ।।८२।।**
**इत्युक्त्वा प्रणतायोचे सिद्धः शिष्याय सत्तमः । याभ्यां परं पुमान्याति स्वानन्दो वैष्णवं पदम् ।।८३।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे तीर्थयात्रोद्देशो नाम नवमोऽध्यायः ।।९।।**

**सप्ताहपारायणे द्वितीयः । अन्ते रसज्ञा वशा..स्तोत्रम् पठनीयम् । अन्यदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

इति उक्त्वा यात्राया प्रेरयामास। ते अपि ययुः। अहं तु तत्र एव सद्गुरु+पद+पद्म+अलिः अभवम्।८१। यदु+अर्जुनाभ्यां गुह्यौ वित्+योगौ प्राक् यथा प्राह तथा एष मे प्राह। (हे) विनीत शिष्य ते कथयामि।८२। इति उक्त्वा सत्तमः सिद्धः प्रणताय शिष्याय (तौ योगौ) ऊचे याभ्यां पुमान् स्वानन्दो परं वैष्णवं पदं याति।८३।

(शेवटचे दोन श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी क्षेपक म्हटलेले आहेत. त्याचे कारण असे दिसते की ह्यांचा विषय मूळ गुरुचरित्रांतला नाही. सिद्धमुनींनी नामधारकाला दिलेले हे आश्वासन आहे.) सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, 'ह्या दत्तप्रभूंनी यदु आणि कार्तवीर्यार्जुन यांना गूढ अशा ज्ञानमार्ग आणि योगमार्गांचा उपदेश पूर्वींच्या युगांत केला तसाच मलाही केला. हे शिष्योत्तमा, तूही नम्रतादि गुणांनी अधिकारी असल्याने ते मी तुला सांगत आहे'.८२. असे बोलून संतश्रेष्ठ सिद्धमुनींनी गीतेतील प्रतिपादनानुसार प्रणिपात, परिप्रश्न आणि सेवा यांचे अनुष्ठान करणाऱ्या शिष्याला - नामधारकाला, त्या दोन्ही योगांचे निरूपण केले, ज्यांयोगे पुरुष आनंदपूर्ण होऊन त्या परम वैष्णव पदाला पावतो.८३.

**तीर्थयात्रेचे महत्त्व -** *'उत्तमा सहजावस्था मध्यमा योगधारणा। अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाऽधमा।।'* अशी वर्गवारी शास्त्राने केलेली असली तरी महापाप्यांना मात्र प्रायश्चित्तादींच्या अनुष्ठानाने पापक्षय केल्याविना ज्ञान होऊ शकत नाही. 'आरशाचा पृष्ठभाग स्वच्छ केल्यावर त्यांत आपले प्रतिबिंब स्पष्ट दिसावे तसे पापकर्माच्या क्षयाने पुरुषाला

आत्मज्ञान होते; आपल्या चित्तांतच आत्म्याचे दर्शन होते.' (महाभारत, शांतिपर्व २०४:८) या स्मृतिवचनानुसार योग, याग इत्यादींचे अनुष्ठान करण्यास असमर्थ असणाऱ्या मुमुक्षूंना ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापाच्या क्षयासाठी, विवेकी लोकांसाठी कनिष्ठ गणल्या गेलेल्या तीर्थयात्रेचा उपदेश योग्यच आहे. पुरुषांसाठी विहित अशा संस्कारांनी संस्कृत झालेल्या शुद्धचित्तांतच आत्मज्ञान सहजच प्रकाशते. आत्मज्ञानाचा उदय झाल्यानंतर, त्या ब्रह्मानंदाचा रस लाभल्यावरच अभयावस्था लाभते (तैत्तिरीय उ. २:७). त्याला कुणाचीही भीती उरत नाही. पापपुण्य त्याला शिवू शकत नाहीत. अशी नैष्कर्म्यावस्था येते (तैत्तिरीय उ. २:९). त्यापूर्वी पूर्वसंचित पापकर्मांचा क्षय करून विद्येचा प्रादुर्भाव होण्यासाठीच कर्मांची आवश्यकता आहे. ही कर्मे बृहदारण्यकोपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे यज्ञ, दान, तप हीच होत. 'मग इथे तीर्थयात्रेचे निरूपण कसे केले?' अशा शंकेचे निराकरण स्वामिमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे. संसारसागरातून तारून नेणारी किंवा तरणोपाय असणारी ती तीर्थे अशा अर्थाने गंगादि ऋषिजुष्ट (ऋषींनी सेवन केलेल्या) जलांना तीर्थ असा शब्द रूढ झाला आहे. त्या जलांत स्नानादींनी कर्माच्या अनुष्ठानासारखाच पापक्षय होतो. यामुळेच ऋग्वेदांत (१:२३:२२-२३) तसेच तैत्तिरीय आरण्यकांत (१:१) जलदेवतांची प्रार्थना करणारे मंत्र आहेत. योगवासिष्ठांतही श्रीरामप्रभूंच्या तीर्थयात्रेचे वर्णन आलेले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा नववा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# दशमोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**शिष्यांस्तु तीर्थयात्रायै प्रेरयित्वा स्वयं कुह । उवास भगवान्ब्रूहि श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**संवत्सरं वैद्यनाथ-समीपमकरोद्विभुः । निवासमहमप्येतत्पादाब्जभ्रमरोऽभवम् ।।२।।**

**तत्रैत्यैको द्विजो मन्दो नमस्कृत्याब्रवीद्गुरुम् । प्रपद्ये भगवंस्त्वां मे मोक्षोपायमुपादिश ।।३।।**

नामधारक उवाच। शिष्यान् तार्थयात्रायै प्रेरयित्वा तु स्वयं भगवान् कुह उवास? (हे गुरो! मे) ब्रूहि। सादरं श्रोतुं इच्छामि।१। विभुः संवत्सरं वैद्यनाथसमीपं निवासं अकरोत्। अहं अपि तत्+पाद+अब्ज+भ्रमरः अभवम्।२। तत्र एकः मन्दः द्विजः गुरुं नमस्कृत्य अब्रवीत्। (भो) भगवन्! त्वां प्रपद्ये। मे मोक्ष+उपायं उपादिश।३।

श्रीगणेशाय नमः। **दहाव्यांत धौम्यगुरूंच्या शिष्यांची सांगुनी गोष्ट । पश्चात्तप्त द्विजाला करिती श्रीगुरु कृतार्थ ।।१।।** नामधारक विचारतो, सर्व शिष्यांना तीर्थयात्रेला पाठवून स्वतः भगवान कुठे बरे राहिले? मी आदरपूर्वक ऐकायला उत्सुक आहे; तरी आपण मला सांगा. या प्रश्नाच्या उत्तरांतून सिद्ध मुनी वेदांचे एक मर्म नामधारकाला सांगणार आहेत ते हे की गुरूंच्या मुखांतून श्रवण केलेली विद्याच उत्कृष्ट सिद्धीची प्राप्ती करून देते.१. 'प्रभूंनी परळी येथे वैद्यनाथांच्या निकट एक वर्ष वास्तव्य केले. मीसुद्धां त्यांच्या पदकमलांचा भ्रमर होऊन त्यांच्या सान्निध्याचा लाभ घेत होतो.२. तिथे असतांना एक मंदबुद्धी ब्राह्मण श्रीगुरूंना अभिवादन करून म्हणाला, 'हे प्रभो! मी आपल्याला शरण आलो आहे. तरी आपण मला मोक्षमार्गाचा उपदेश करावा.'३.

**मया तु सिद्धये कष्टं भूर्यकारि तथापि मे । नाप्ता सिद्धिर्नोपलब्धः सन्मार्गप्रापको गुरुः ।।४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कथं गुरुं विना वत्स सिद्धये केन योजितः । कस्याज्ञया कृतं कष्टमित्याकर्ण्य द्विजोऽब्रवीत् ।।५।।**

**सिद्ध्यै मया गुरुः कश्चिच्छ्रितश्चण्डः स तु प्रभो । सेवार्थी पीडयामास ततस्त्यक्तः स वै मया ।।६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**हन्तासाधु कृतं धिक्त्वां गच्छेतः सत्वरं यतः । गुरुद्रोह्यास्यावलोको न भद्राय कथंचन ।।७।।**

मया तु सिद्धये भूरि कष्टं अकारि। तथपि मे सिद्धिं न आप्ता। सन्+मार्ग+प्रापकः गुरुः न उपलब्धः।४। श्रीगुरुः उवाच। (हे) वत्स, गुरुं विना केन कथं सिद्धये योजितः? कस्य आज्ञया कष्टं कृतम्? इति आकर्ण्य द्विजः अब्रवीत्।५। मया सिद्ध्यै कश्चित् गुरुः श्रितः। (हे) प्रभो, स तु चण्डः, सेवार्थी, मां पीडयामास। ततः स मया त्यक्तः वै।६। हन्त! असाधु कृतम्। त्वां धिक्। इतः सत्वरं गच्छ, यतः गुरु+द्रोह्यस्य अवलोकः कथंचन भद्राय न।७।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, गुरूवीण कुणी, कशा प्रकारे मोक्षमार्गाला प्रवृत्त केले? आणि तू खूप कष्ट घेतले असे म्हणतोस ते कुणाच्या आज्ञेने? हे प्रश्न ऐकून तो ब्राह्मण सांगूं लागला.४. 'मी सिद्धीसाठी जपतपादि खूप कष्ट केले. तरीही मला ना सिद्धी मिळाली न परमार्थमार्गावर नेणारा गुरू मिळाला! मी मोक्षासाठी एका गुरूचा आश्रय केला होता. परंतु तो अति कोपिष्ट आणि केवळ सेवेची अपेक्षाच करणारा होता. त्याने माझा खूपच छळ केल्यामुळे मी त्याचा त्याग केला.'६. 'अरेरे! तू हे निंदनीय कृत्य केलेले आहेस. आपले दोन्ही कान ब्रह्माच्या यथार्थ निरूपणाने भरून टाकणारा गुरु आपल्या आईवडिलांसारखा असतो. त्याचा कधीही द्रोह करूं नये, असे मनूचे वचन आहे (मनुस्मृति २:१४४). तूं इथून ताबडतोब चालता हो! गुरुद्रोह्याचे तोंड पाहणाऱ्याचे कधीही भले होत नाही! मग त्याच्याशी संभाषणादि करणे तर दूरच.'७.

**प्रणिपातपरिप्रश्न-सेवाधर्मपराङ्मुखे । कुतो गुरुकृपालेशस्तद्वत्येव प्रसन्नता ।।८।।**

**।। द्विज उवाच ।।**

**कथं ज्ञेयः कथं सेव्यो गुरुस्तन्मे वदाखिलम् । अजानता गुरुद्रोहः कृतोऽतो मोद्धर प्रभो ।।९।।**

प्रणिपात+परिप्रश्न+सेवा+धर्म+पराङ्मुखे कुतो गुरुकृपालेशः? तद्वति एव प्रसन्नता।८। द्विज उवाच। गुरुः कथं ज्ञेयः, कथं सेव्यः तत् अखिलं मे वद। अजानता गुरुद्रोहः कृतः। अतो मां उद्धर।९।

**गुरूच्या त्यागाचा निषेध -** मनुस्मृतीत (५७:७) असेही सांगितले आहे की, कार्याकार्याचा विचार न करतां उन्मार्गगामी दोषलिप्त गुरूचाही त्याग करावा. मग छळवादी गुरूचा त्याग केल्याबद्दल त्या ब्राह्मणाला कां निघून जायला सांगितले? या शंकेचे निरसन करण्यासाठी पुढचा श्लोक सांगितला आहे. मनूच्या वचनांत गुरूचाही (*गुरोरपि*) असा शब्दप्रयोग आहे. त्याचा अर्थ असा होतो की दोषत्रयांनी लिप्त असा गुरूसुद्धां त्याज्य किंवा दंड्य आहे. मग इतरांची काय कथा? ह्याने इतरांच्या त्यागाला बळकटी दिलेली आहे. गुरूच्या त्यागाचे समर्थन केलेले नाही. 'प्रसंगी मातृगमन करावे पण गंगेच्या कांठी दान घेऊ नये; पुत्राचे मांस खाल्ले तरी चालेल पण राजाकडून दान घेऊं नये,' इत्यादि वचने मातृगमनाचे किवा पुत्रमांसभक्षणाचे समर्थन करणारी नाहीत तर गंगाप्रतिग्रहाचा आणि राजप्रतिग्रहाचा निषेध करणारी आहेत. अशा वचनांना चोदना मानल्या तर अनर्थ होईल आणि *'चोदनालक्षणो धर्मः'* (मीमांसादर्शन १:१:२) ह्या सूत्राचा विपर्यास होईल. दोषलिप्तही गुरूचा त्याग कधीही समर्थनीय ठरणार नाही; मग उपकारकर्त्या गुरूचा कसा ठरेल? शिवाय इथे तर त्या ब्राह्मणाने सेवेलाच पीडा मानून आळसापोटी गुरूला सोडून दिले आहे. 'शिष्याची योग्यता येण्यासाठी प्रणिपात, परिप्रश्न, सेवा ह्या धर्मांचे पालन करायला हवे. तो गुरू दोषत्रयलिप्त नसतांना त्याचा त्याग केला आहे. तेव्हां अशाचे तोंड पाहूं नये' हे श्रीगुरूंचे म्हणणे योग्यच आहे.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गुरुर्निरुपमः साक्षाद् ब्रह्मविष्णुशिवात्मकः । सोऽज्ञेयस्त्वादृशैरन्धैस्तद्वत्सेवापि सद्गुरोः ।।१०।।**
**एतदर्थं पुरा वृत्तं शृणु धौम्याभिधो मुनिः । द्वापरेऽभूत् त्रयश्छात्रा आसन्तस्याङ्ग तत्पराः ।।११।।**

श्रीगुरुः उवाच। गुरुः निरुपमः। साक्षात् ब्रह्म+विष्णु+शिव+आत्मकः। सः त्वादृशैः अन्धैः अज्ञेयः। तद्वत् सद्गुरोः सेवा अपि (अज्ञेया)।१०। एतत् अर्थं पुरा वृत्तं शृणु। द्वापरे धौम्य+अभिधः मुनिः अभूत्। (हे) अङ्ग, तस्य त्रयः तत्पराः छात्राः आसन्।११।

वरील शिष्यधर्माचे पालन करणाऱ्यालाच गुरूची प्रसन्नता लाभते.८. श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्याचे मनन केल्यावर त्या ब्राह्मणाला स्वतःच्या अपराधाची जाणीव झाली. त्याचे परिमार्जन करण्यासाठी गुरूंना कसे ओळखावे आणि त्यांची सेवा कशा प्रकारे करावी ते तो श्रीगुरूंना विचारीत आहे. श्रीगुरूंविषयीच्या अज्ञानापोटी माझ्याकडून गुरुद्रोह झालेला आहे. तरी हे प्रभो, मला या पापांतून वर काढा.९. यावर श्रीगुरू म्हणाले, 'गुरूंना कशाचीही उपमा देतां येत नाही. ते साक्षात् ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांचे स्वरूप आहेत. तुझ्यासारख्या आंधळ्यांना सद्गुरूंचे किंवा त्यांच्या सेवेचे ज्ञान होऊं शकत नाही.' भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांनी शतश्लोकींत (१) सद्गुरूंचे निरुपमत्व असे प्रतिपादले आहे. आत्मज्ञानाचे दान देणाऱ्या सद्गुरूंना त्रिभुवनांतही दृष्टांत सांपडत नाही. परीसाची उपमा द्यावी तो तो परीस लोखंडाचे सोने करतो, पण त्याला परीसत्व देत नाही. पण सद्गुरू मात्र आपल्या चरणांच्या आश्रयाला आलेल्या शिष्याला आपले साम्यच बहाल करतो. या कारणाने गुरू निरुपम आणि अलौकिक आहेत.' साहजिकच ते ब्रह्मा-विष्णू-शिवस्वरूप ठरतात.१०. याविषयींचा एक इतिहास ऐक. द्वापरयुगांत धौम्य नांवाचा एक मुनि होते. त्यांचे तीन शिष्य होते. ते सेवाधर्माचे ज्ञाते असल्याने गुरुसेवेला तत्पर होते.११.

**बैदारुणोपमन्य्वाख्याः सेवाधर्मसुशिक्षिताः । तेषां परीक्षितुं भावं गुरुः प्राह दयार्द्रधीः ॥१२॥**
**मच्छालेयेऽम्ब्वभावोऽस्ति जीवेत्सस्यमतः कुतः । गत्वा वः कोपि यत्नेन क्षेत्रमम्ब्वानयत्वरम् ॥१३॥**
**श्रुत्वैवमरुणोऽह्नाय गत्वा क्षेत्रसमीपतः । जलमानीय यत्नेन पल्वलात्क्षेत्रमुन्नतम् ॥१४॥**
**दृष्ट्वाऽकरोत्क्षेत्रतुल्यं वारिवारणमाशु तत् । जलप्रवाहः सहसा क्षेत्रादन्यत्र निर्ययौ ॥१५॥**
**न्यस्तोऽपि पाषाणचयः स्थातुं तत्र शशाक नो । मन्ये क्षेत्रे जलाभावाद् गुरुर्मां धिक्करिष्यति ॥१६॥**
**गुर्वर्थमत्र मर्तव्यमिति मत्वोभयत्र सः । स्वाङ्गं निधायोपरिष्टाज्जलैः क्षेत्रमपूरयत् ॥१७॥**

बैद+आरुणि+उपमन्यु+आख्याः सेवा+धर्म+सुशिक्षिताः। तेषां भावं परीक्षितुं दयार्द्रधीः गुरुः प्राह।१२। मत्+शालेये अम्बु+अभावः अस्ति। अतः सस्यः कुतः जीवेत्? वः कः अपि गत्वा यत्नेन क्षेत्रं अम्बु अरं आनयतु।१३। एवं श्रुत्वा अरुणः अह्नः क्षेत्रसमीपतः गत्वा पल्वलात् यत्नेन जलं आनीय, पल्वलात् क्षेत्रं उन्नतं दृष्ट्वा आशु क्षेत्रतुल्यं वारिवारणं अकरोत्। तत् जलप्रवाहः सहसा क्षेत्रात् अन्यत्र निर्ययौ।१५। तत्र न्यस्तः पाषाणचयः अपि स्थातुं न शशाक। (सः) मन्ये क्षेत्रे जल+अभावात् गुरुः मां धिक् करिष्यति।१६। अत्र गुरु+अर्थम् मर्तव्यं इति मत्वा सः उभयतः स्वांगं निधाय उपरिष्टात् जलैः क्षेत्रं अपूरयत्।१७।

त्यांची नांवे बैद, आरुणी आणि उपमन्यु अशी होती. त्यांच्या गुरुभक्तीची परीक्षा करण्यासाठी ते दयाळु गुरू त्यांना म्हणाले.१३. 'माझ्या भातशेतीला पाण्याचा तुटवडा आहे; ते पीक कसे तग धरील? तुम्ही कुणी तरी जाऊन प्रयत्नपूर्वक शेतीला लवकर पाणी पुरवा.'१४. धौम्यमुनींची ही आज्ञा ऐकून आरुणी लगेच शेतीकडे गेला. त्याने तलावांतील पाणी कालवा काढून प्रयत्नपूर्वक शेतीजवळ आणले. पण तळ्यापेक्षा शेती उंच असल्याने पाणी अडवून शेतीच्या वर चढविले. तरीही शेतीतून ते पाणी खाली वाहून गेले.१५. आरुणीने तिथे रचलेले दगडही वाहून गेले. त्याला असे वाटले की शेतीमध्ये पाणी आणले नाही तर गुरू माझा धिक्कार करतील.१६. इथे गुरूंच्या कार्यासाठी मरण आले तरी बेहत्तर असा विचार करून त्याने शेतीच्या बाहेर जाणारा पाण्याचा मार्ग आपल्या शरीरानेच अडविला आणि अशा रीतीने शेत पाण्याने भरून टाकले.१७.

**धौम्योऽपि क्षेत्रमेत्याम्बु-पूर्णं शालेयमीक्ष्य सः । खिन्नः शिष्यमदृष्ट्वैहि वत्सेत्यावाहयन्मुदा ।।१८।।**
**प्रत्युत्तरं जलाक्तान्त-रङ्गो दातुं स न क्षमः । किञ्चिद्ध्वनिं चकारासौ तच्छ्रुत्वैत्य ददर्श तम् ।।१९।।**
**कृपया परयोत्थाप्य भक्तिं ज्ञात्वा स तत्क्षणम । तस्मिन्प्रसन्नः सम्भूय स्वीयं साम्यं व्यधान्मुनिः ।।२०।।**
**विद्याविनयसंपन्नो भूत्वा संतोष्य सद्गुरुम् । तदाज्ञया ययौ धाम स्वमर्च्योऽभवदत्र सः ।।२१।।**
**ततो बैदं गुरुः प्राह सस्यं मे शिष्य सर्वतः । रक्षयित्वानु धान्यं तद्यत्नात्सर्वं समानय ।।२२।।**

धौम्यः अपि क्षेत्रं एत्य शालेयं अम्बु+पूर्णं ईक्ष्य सः शिष्यं अदृष्ट्वा खिन्नः वत्स, एहि, इति मुदा आह्वयत्।१८। परया कृपया (तं) उत्थाप्य (तस्य) भक्तिं ज्ञात्वा सः (गुरुः) मुनिः तस्मिन् प्रसन्नः सम्भूय तत् क्षणं स्वीयं साम्यं व्यधात्।१९। सः (शिष्यः) जलाक्त+अंतरंगः प्रत्युत्तरं दातुं न क्षमः। असौ किञ्चित् ध्वनिं चकार। तत् श्रुत्वा एत्य तं ददर्श।२०। (सः) विद्याविनयसंपन्नो भूत्वा सद्गुरुं संतोष्य तत्+आज्ञया स्वं धाम ययौ। अत्र सः अर्च्यः अभवत्।२१। ततः गुरुः बैदं प्राह, (हे) शिष्य, मे सस्यं सर्वतः रक्षयित्वा अनु तत् सर्वं धान्यं यत्नात् समानय।२२।

इतक्यांत धौम्यमुनीही शेतावर आले आणि रानांत पाणी भरलेले पाहून आनंदित झाले. पण शिष्य कुठे दिसत नाही असे पाहून खिन्नही झाले आणि बाळा, इकडे ये, अशा हांका मारूं लागले.१८. पाण्यांत बुडलेला असल्याने शिष्य त्यांच्या हांकेला प्रतिसाद देऊं शकला नाही. त्याने थोडासा आवाज केला. तो ऐकून गुरू तिथे आले आणि त्यांनी आपल्या शिष्याची अवस्था पाहिली.१९. त्याला तसे पाहून धौम्यमुनींच्या मनांत अत्यंत करुणा उपजली आणि आरुणीची भक्ती त्यांनी जाणली. ते त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला तात्काळ आपल्यासारखे केले.२०. अशा रीतीने विद्या आणि विनय यांनी संपन्न होऊन तसेच त्यांना दक्षिणादानाने संतुष्ट करून, सोडमुंज करून आपल्या घरी गेला. सद्गुरूंच्या प्रसादाने विद्वत्ता प्राप्त करून या लोकांत तो पूज्य झाला.२१. नंतर धौम्यगुरूंनी बैद नांवाच्या दुसऱ्या शिष्याला बोलावून सांगितले, 'बा शिष्या, माझ्या शेतांतील पिकाची चांगली राखण करून मग खळे करून वेगळे केलेले सर्व धान्य प्रयत्नपूर्वक व्यवस्थित घेऊन ये.' **सस्य** म्हणजे शेतांतील कणीस इत्यादि पीक; **धान्य** म्हणजे साळी इत्यादि कोंड्यासह असलेले; **तण्डुल** म्हणजे सडलेले तांदूळ; **अन्न** म्हणजे शिजवलेला भात.२२.

**आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा पशुपक्षिनिवारणैः । सस्यं ररक्ष पश्चात्तच्छित्वा धान्यं स निर्ममे ।।२३।।**
**शशंस गुरवे न्यस्तो धान्यराशिर्मया गुरो । क्षेत्रेऽत्रानेतुमेकं मे शकटं देहि सर्षभम् ।।२४।।**
**तच्छ्रुत्वा शकटं तस्मै स लुलायेन योजितम् । प्रददौ स तमादाय नीत्वा विन्यस्य चाखिलान् ।।२५।।**
**शालीनाहरदर्धाध्वं तत्र पङ्के सकासरः । संलग्नोऽभूत्स्वयं सोऽथ स्वकण्ठेऽयोजयद्युगम् ।।२६।।**
**सलुलायः स शिष्यस्तु तत्र भारातिरेकतः । पपात तत्र सहसा धौम्यः प्राप यदृच्छया ।।२७।।**

आज्ञा प्रमाणम् इति उक्त्वा सः पशु+पक्षि+निवारणैः सस्यं ररक्ष, पश्चात् तत् छित्त्वा धान्यं निर्ममे।२३। गुरवे शशंस, '(हे) गुरो, मया क्षेत्रे धान्य+राशिः न्यस्तः। अत्र आनेतुं मे एकं सः+ऋषभंर शकटं देहि।'२४। तत् श्रुत्वा सः तस्मै लुलायेन योजितं शकटं प्रददौ। स तं आदाय नीत्वा अखिलान् शालीन् विन्यस्य आहरत्।२५। तत्र अर्ध+अध्वं सकासरः (शकटः) पङ्के संलग्नः अभूत्। अथ सः स्वयं स्वकंठे युगं अयोजयत्।२६। सः शिष्यः तु तत्र भारातिरेकतः सलुलायः पपात। तत्र धौम्यः यदृच्छया सहसा प्राप।२७।

'आपली आज्ञा प्रमाण आहे,' असे म्हणून ती मस्तकी धारण करून, बैदाने पशू, पक्षी इत्यादिकांपासून त्या धान्याची राखण करून योग्य वेळी त्या पिकातील धान्य खळे करून धान्य बाजूला केले.२३. मग त्यांनी गुरूंना जाऊन सांगितले, 'गुरुमहाराज, मी शेतांत धान्याची रास लावली आहे. ते इथे घरी आणायला मला मला एक बैल जोडलेली गाडी पाहिजे.'२४. ते ऐकून गुरूंनी त्याला एक रेडा जोडलेला गाडा दिला. बैद तो गाडा घेऊन शेताला आला आणि त्याने सगळ्या साळी त्याने त्यांत भरल्या.२५. तो गाडा घेऊन येतांना अर्ध्या वाटेत तो रेड्यासकट चिखलांत रुतला. तेव्हां शिष्याने स्वतःलाच त्या गाड्याच्या जुवाला जुपून घेतले.२६. रेड्यासह स्वतः गाडा ओढत असतां तो शिष्य ओझे फार झाल्याने पडला. एवढ्यांत धौम्य ऋषि फिरत फिरत तिथे आले.२७.

**तत्कर्म प्रेक्ष्य घोरं तं मोचयित्वा प्रसन्नधीः । वरं तस्मै ददौ येन स परत्रात्र चोत्तमः ।।२८।।**
**अथोपमन्युमाहैष गाश्चारय सदेत्यथ । कतिकालं तदा चक्रे स्वल्पभुक्क्षुधितोऽभवत् ।।२९।।**
**वने विप्रालयान्प्रेक्ष्य स्वं पुपोषान्नयाच्ञया । पुष्टोऽसि कथमित्युक्तो गुरुणा तन्न्यवेदयत् ।।३०।।**
**तन्मे देहीति गुरुणा भाषितः स तथाकरोत् । स पश्चाद्याच्ञयारक्षत्स्वं तद्वेदापि वै मुनिः ।।३१।।**
**द्विवारमर्पयेत्यूचे सच्छिष्योऽपि तथाकरोत् । पीत्वा ररक्ष गा दुग्धं वत्सपीतावशेषकम् ।।३२।।**

तत् घोरं कर्म प्रेक्ष्य, तं मोचयित्वा प्रसन्न+धीः तस्मै वरं ददौ, येन सः परत्र अत्र च उत्तमः (बभूव)।२८। अथ एष उपमन्युं आह, 'सदा गाः चारय', इति। अथ कतिकालं स्वल्प+भुक् तथा चक्रे। क्षुधितो अभवत्।२९। वने विप्र+आलयान् प्रेक्ष्य स्वं अन्न+याच्ञया पुपोष। गुरुणा कथं पुष्टः असि? इति उक्त्वा तत् न्यवेदयत्।३०। गुरुणा तत् मे देही इति भाषितः सः तथा अकरोत्। स पश्चात् याच्ञया स्वं अरक्षत्। मुनिः तत् अपि वै वेद।३१। 'द्विवारं अर्पय', इति ऊचे। सत्+शिष्यः अपि तथा अकरोत। वत्स+पीत+अवशेषकं दुग्धं पीत्वा गाः ररक्ष।३२।

आपल्या शिष्याने जिवावर उदार होऊन केलेले ते गाडा ओढण्याचे भयंकर कर्म पाहून गुरूंनी त्याला जुवांपासून मोकळे केले. त्याच्या ह्या सेवाभावाने प्रसन्न झालेल्या धौम्य मुनींनी त्याला असा वर दिला जेणेकरून तो इहलोकांत विद्यादींच्या प्राप्तीने आणि परलोकांत दिव्य भोगांनी श्रेष्ठ गती पावला.२८. मग ह्या गुरूंनी उपमन्यूला, 'तूं गाई चारत जा', असे सांगितले. सकाळी लवकरच अल्पच आहार घेऊन तो गाई चारायला जाऊं लागला. पण त्याला भुकेने व्याकुळ केले.२९. रानांत ब्राह्मणाची घरे पाहून त्यांच्याकडे माधुकरी मागून तो आपले पोट भरू लागला. गुरूंनी त्याला विचारले, '(घरी अन्न पुरेसे मिळत नसतांही) तूं कसा धष्टपुष्ट दिसतोस?' तेव्हां त्याने त्यांना सर्व सांगितले.३०. गुरूंनी, 'ते माधुकरीचे अन्नही घरी आणून देत जा', असे सांगितल्यावरून तो तसे करूं लागला. मग तो पुन्हां एकदां माधुकरी मागून आपली भूक भागवूं लागला. तेसुद्धा गुरूंना कळलेच!३१. त्यांनी दुसरी भिक्षाही घरीच द्यायला सांगितली. त्या आज्ञाधारक शिष्याने बिनतक्रार तसेच केले. मग तो वासरांनी पिऊन सांडलेले गाईंचे दूध ओंजळीत घेऊन पिऊन गाई राखूं लागला.३२.

**तज्ज्ञात्वा धीभ्रंशभिया वारितो गुरुणा वने । अर्कक्षीरं दधौ पातुं तत्तस्याक्ष्णोः पपात ह ।।३३।।**
**स पपातान्धवद् गावो ययुर्गेहं गुरुस्तदा । अन्वेष्य तं तथा दृष्ट्वा तं प्राह स्तुहि रेऽश्विनौ ।।३४।।**
**सोऽश्विस्तवाद्दृष्टिमाप गुरुणा तदुपर्यपि । कृपा कृता तेन सोऽपि कृतकृत्योऽभवद्द्रुतम् ।।३५।।**
**तच्छिष्या अपि तत्तुल्या बभूवुः शृणु सादरम् । उद्दालकोऽस्य शिष्यः सन्सत्रेऽहीनदहद्बहून् ।।३६।।**

तत् ज्ञात्वा गुरुणा धी+भ्रंश+भिया वारितः। वने अर्कक्षीरं पातुं दधौ। तत् तस्य अक्ष्णोः पपात ह।३३। सः अन्धवत् पपात। गावः गेहं ययुः। तदा गुरुः तं अन्वेक्ष्य तथा दृष्ट्वा प्राह, 'रे, अश्विनौ स्तुहि।'३४। सः अश्वि+स्तवात् दृष्टिं आप। तत् उपरि अपि गुरुणा कृपा कृता। तेन सः अपि द्रुतं कृतकृत्यः अभवत्।३५। तत्+शिष्याः अपि तत्+तुल्या बभूव। सादरं शृणु। उद्दालकः अस्य शिष्यः सन्। सत्रे बहून् अहीन् अदहत्।३६।

ते गुरूंना समजल्यावर त्यांनी उष्टे दूध प्याल्याने बुद्धीवर दुष्परिणाम होईल म्हणून त्याला मनाई केली. तेव्हां तो एकदां वनांत गाई चारायला जात असतां एका तुटलेल्या रुईच्या झाडांतून गळणारा चीक त्याने पाहिला. तेव्हां 'हे कांही उष्टे नाही' असा विचार करून पिण्यासाठी ओंजळीत घेतले. पण ते पीत असतांना चुकून त्याच्या डोळ्यांत गेले.३३. त्यामुळे त्याची दृष्टी जाऊन तो आंधळ्यासारखा तिथे एका खड्ड्यात पडला. गाई घरी गेल्या. तेव्हां उपमन्यू कां आला नाही याचा शोध घेत, त्याच्या कण्हण्याच्या आवाजाच्या अनुरोधाने गुरू तिथे आले. त्यांनी त्याची ती अवस्था पाहून त्याला अश्विनीकुमारांची स्तुती त्यांच्या मंत्राद्वारा करायला सांगितली.३४. त्याप्रमाणे उपमन्यूने अश्विनीकुमारांचे स्तवन केले आणि त्याची दृष्टी परत आली. पूर्वीच्या दोन शिष्यांप्रमाणे त्याच्यावरही गुरूंनी कृपा केली आणि तोसुद्धां कृतकृत्य झाला.३५. त्याचे - उपमन्यूचे शिष्यही त्याच्यासारखेच श्रेष्ठ झाले. उद्दालक नांवाच्या त्याच्या शिष्याने जनमेजयाने केलेल्या सर्पसत्रांत असंख्य सर्पांची आहुती दिली.३६.

**जनमेजयतोषार्थं स्वर्गाच्छक्रं समानयत् । अयं गुरुप्रसादस्तत्-तोषात्प्राप्यो न चान्यथा ।।३७।।**
**अतस्तमेव शरणं सर्वभावेन गच्छ भोः । तत्प्रसादात्परां शान्तिं मोक्षं प्राप्स्यसि दुर्लभम् ।।३८।।**

**।। विप्र उवाच ।।**

**युज्यते भिन्नधात्वैक्यं न मुक्तायास्तथा हृदः । तद्धृद्भिन्नं न यास्येऽतः प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ।।३९।।**
**इति तन्निश्चयं ज्ञात्वा के विन्यस्य करं गुरुः । तापदग्धाशुभस्यास्य प्राहाङ्ग स्वगुरुं स्मर ।।४०।।**

जनमेजय+तोषार्थं स्वर्गात् शक्रं समानयत्। अयं गुरु+प्रसादः तत्+तोषात् प्राप्यः। न च अन्यथा।३७। भोः, अतः तं एव सर्व+भावेन शरणं गच्छ। तत्+प्रसादात् परां शांतिं (तथा) दुर्लभं मोक्षं प्राप्स्यसि।३८। विप्र उवाच। भिन्न+धातु+ऐक्यं युज्यते, न मुक्तायाः। तथा हृदः। तत् हृत् (मया) भिन्नम्। अतः न यास्ये। ते अग्रतः प्राणान् त्यक्ष्यामि।३९। इति तत्+निश्चयं ज्ञात्वा ताप+दग्ध+अशुभस्य अस्य के करं विन्यस्य प्राह, अङ्ग, स्वगुरुं स्मर।४०।

जनमेजयाच्या आदेशाने त्याने तक्षकाला आश्रय दिलेल्या इंद्रालाही स्वर्गांतून खाली आणले. हा गुरूंचा कृपाप्रसाद केवळ त्यांना प्रसन्न करूनच प्राप्त होतो. त्याला दुसरा कांहीही उपाय नाही. गुरुकृपेविण आपल्या बुद्धीच्या बळावर ते ज्ञान मिळवतां येत नाही. ही मति तर्काने मिळवतां येत नाही असे कठोपनिषदाचे (१:२:९) प्रतिपादन आहे.३७. 'अरे ब्राह्मणा, याकरितां तूं सर्वभावे तुझ्या गुरूंनाच शरण जा. गीतेच्या वचनानुसार (४:३९) त्यांच्याच ज्ञानरूपी प्रसादाने तुला परम शांतीचा तसेच दुर्लभ अशा मोक्षाचाही लाभ होईल.'३८. तो ब्राह्मण म्हणाला, 'प्रभो, सोन्याचांदीसारख्या धातूचे पात्र, अलंकार इत्यादी भंग पावले तर ते वितळवून जोडतां येतात. मोती मात्र फुटले तर जोडतां येत नाही. मनाचेही तसेच आहे. मी माझ्या गुरूंचे मन मोडले आहे. तरी मी आतां त्यांच्याकडे कोणत्या तोंडाने जाऊं? त्यापेक्षां मी माझ्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून इथेच आपल्यासमोरच प्राणत्याग करतो.'३९. हा त्याचा निर्धार पाहून पश्चात्तापाने त्याची पापे नष्ट झाल्याचे जाणून श्रीगुरूंनी त्याच्या शिरावर हात ठेवला आणि म्हणाले, 'बा ब्राह्मणा, आपल्या गुरूंचे स्मरण कर.'४०.

**द्विजोऽपि स्वगुरुं स्मृत्वा तत्स्वरूपमिव प्रभुम् । ददर्श श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टाव स मुदश्रुयुक् ।।४१।।**
**तमाह प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुस्त्वं यथाक्रमम् । लघु निस्तीर्य कर्मौघं परां संसिद्धिमाप्स्यसि ।।४२।।**
**त्वया व्यालोकि रूपं मे यत्तद्भक्त्या स्मरन्क्रियाः । मदर्थ इत्सदासक्तः कुर्वन्सिद्धिमुपैष्यसि ।।४३।।**
**इति द्विजं तं निजरूपदर्शनात् सुदुर्लभस्वात्मसुखान्वितं प्रभुः ।**
**विधाय चैकं द्विजपुत्रमागतं समुद्दधारच्छितजिह्वमप्यरम् ।।४४।।**
**(क्षेपकः) ये केचन श्रीगुरुमीशबुद्ध्या सन्तापदग्धैनस आव्रजन्ति ।**
**प्रच्छिद्य ते मोहसमूहमाशु स्वानन्दसौख्यं द्विजवत्प्रयान्ति ।।१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते गुरुभक्त्यनुशासनं नाम दशमोऽध्यायः ।।१०।।**

द्विजः अपि स्वगुरुं स्मृत्वा प्रभुं तत्+स्वरूपं इव ददर्श। सः प्रेम्णा मुत्+अश्रु+युक् श्रीगुरुं तुष्टाव।४१। तं प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुः प्राह। कर्म+ओघं यथा+क्रमं लघु निस्तीर्य परां संसिद्धिं आप्स्यसि।४२ यत् मे रूपं त्वया व्यालोकि तत् भक्त्या स्मरन् इत् सदा क्रियाः मत्+अर्थ असक्तः कुर्वन् सिद्धिं उप+एष्यसि।४३। इति प्रभुः तं द्विजं निज+रूप+दर्शनात् सु+दुः+लभ+स्व+आत्म+सुख+अन्वितं विधाय च एकं छित+जिह्वं द्विजपुत्रं आगतं अरं सं+उत्+दधार।४४। ये केचन सन्ताप+दग्ध+एनस श्रीगुरुं ईश+बुद्ध्या आव्रजन्ति, ते द्विजवत् मोह+समूहं आशु प्रच्छिद्य स्वानंद+सौख्यं प्रयान्ति।१।

त्या विप्राने आपल्या गुरूंचे स्मरण करतांच त्याला श्रीगुरू भगवानांच्या ठिकाणी त्यांचेच दर्शन झाले. त्याचा भक्तिभाव उचंबळून डोळे आनंदाश्रूंनी डबडबले आणि तो हात जोडून श्रीगुरूंचे स्तवन करूं लागला.४१.त्या विनम्र ब्राह्मणाला श्रीगुरू म्हणाले, 'तुझ्या प्रारब्धानुसार एकामागून एक येणाऱ्या सुखदुःखांचे भोग सादर भोगून लवकरच संपवशील आणि अंती मोक्षरूपी परमसिद्धी पावशील.' इथे प्रारब्धभोगांची अनिवार्यता आणि श्रीगुरु-ईशकृपेने त्यांचे सुसह्यत्व दाखविले आहे.४२. नारदपुराणांत (पूर्वार्ध ३१:६९-७०) म्हटले आहे की आपण केलेले शुभ तसेच अशुभ

कर्म भोगावेच लागते. न भोगतां कर्म अब्जावधी कल्पांतही घटणार नाही. मग अगणित जन्मातील संचित कर्म आणि सतत निर्माण होत असलेले क्रियमाण कर्म पाहतां हा कर्मांच्या ओघांतून लवकर कसे पार पडतां येईल? ह्या प्रश्नाचे उत्तर ह्या श्लोकांत दिले आहे. 'हे जे माझे स्वरूप तूं पाहिले आहेस त्याचे सतत भक्तिपूर्वक चिंतन करीत सर्व नित्य-नैमित्तिक कर्मे अनासक्त वृत्तीने माझ्या प्रीत्यर्थच करीत जा. जशी देवावर तशीच गुरूंवर भक्ती (श्वेताश्वतर उ. ६:२३) ठेव. अशा ह्या निष्काम कर्मयोगाच्या आचरणाने तुझे अंतःकरण शुद्ध होऊन त्यांत ज्ञानाचा प्रकाश पडेल आणि द्वैताचे स्फुरण मावळून तुला मुक्तीचा लाभ होईल.'४३. अशा प्रकारे त्या विप्राला आपल्या स्वरूपाच्या दर्शनाने अत्यंत दुर्लभ अशा प्रत्यगात्मा (स्व) आणि परमात्मा यांच्या अखंडैकरस सामरस्याने होणाऱ्या सुखाचा लाभ करून दिला आणि कृष्णातीरावर एका जीभ कापून आलेल्या ब्राह्मणपुत्राचा उद्धार केला.४४. (ह्या श्लोकांतील विषय मूळ गुरुचरित्रात असा आलेला नसल्याने त्याला क्षेपक म्हटले असावे.) जे कुणी पश्चात्तापाच्या आगीत आपली पापे जाळून श्रीगुरूंना परमेश्वरस्वरूप मानून शरण येतात ते सर्व मोहमायेचा तत्काळ भेद करून आत्मानंदाचे अधिकारी होतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा दहावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकादशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**क आगतश्छातजिह्वः कथं भगवतोद्धृतः । तत्कथामृतमास्वाद्य तृष्णा मेऽतीव वर्धते ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**करवीरे सुधीपुत्रो जातोऽज्ञस्तं जगुर्बुधाः । विपुच्छशृङ्गो गौस्त्वं गोभाग्यं नात्तं तृणं तु यत् ।।२।।**
**विद्यानिधिर्हर्त्रलभ्यः स शिष्यार्पित एधते । श्रेष्ठेष्वर्च्यं करोत्यूनं क्वाप्यस्वं च धनान्वितम् ।।३।।**

नामधारक उवाच। कः छात+जिह्वः आगतः? भगवता कथं उद्धृतः? तत् कथा+अमृतम् आस्वाद्य मे तृष्णा अतीव वर्धते।१। करवीरे सु+धी+पुत्रः अज्ञः जातः। तं बुधाः जगुः। त्वं वि+पुच्छ+शृंगः गौः। यत् तृणं न अत्तं तत् गो+भाग्यम्।२। विद्या हर्तृ+अलभ्यः निधिः। सः शिष्य+अर्पितः एधते। ऊनं श्रेष्ठेषु अर्च्यं करोति। क्व अपि च अस्वं धन+अन्वितं (करोति)।३।

**श्रीगणेशाय नमः।** *अकराव्यांत संत्रस्त ब्राह्मणाची। छिन्न जीभ सांधुनी साची। गंगानुजावर साउली कृपेची। करुनी पादुका स्थापिल्या।।१।।* सद्गुरूंचा आश्रय केल्यानेच अखंडतया एकरस होऊनच निर्गुण आत्मतत्त्वाची ओळख पटते हाच खरा सिद्धांत असला तरी मंदबुद्धी साधकांना सगुण परमात्म्याचीच उपासना इष्ट आहे. त्यासाठी भगवंताच्या गुणांचे वर्णन करावे. आत्मसाक्षात्कारानंतर स्त्री-पुत्रादि विषयांपासून मनाची सहजच उपरती होते. पण अनेक जन्मात केलेल्या विषयसेवनाने, त्या विषयांकडे असलेला ओढा सहसा कमी होत नाही. त्या विषयांची आसक्ती दूर करण्यासाठी ईश्वररूप अशा सद्गुरूंची सेवा केली पाहिजे हे मागच्या अध्यायांत सफल गुरुसेवेच्या उदाहरणाने स्पष्ट केले. त्याच्याच दृढीकरणासाठी आतां या अध्यायांत इतर देवतादिकांच्या उपासनेपेक्षा ईश्वराचेच सगुण रूप असलेल्या सद्गुरूंच्या उपासनेने ऐहिक आणि पारलौकिक लाभही अनायासेच होतात हे विशद करण्याला आरंभ करीत आहेत.

**सुखे स्त्रीवावनेऽम्बेव सखेव क्वापि तातवत् । हिते बोधे च गुरुवद्विद्या धिक्त्वामविद्य रे ।।४।।**

**इति निर्भर्त्सितस्त्रस्तो भिल्लवाटीं ययौ स तु । प्रायोपविष्टोऽनशन आनर्च भुवनेश्वरीम् ।।५।।**

सुखे स्त्री इव। अवने अम्बा इव। क्व अपि सखा इव। हिते तातवत्। बोधे च गुरुवत्। हे अविद्य त्वां धिक्।४। इति निर्भर्त्सितः त्रस्तः सः भिल्लवाटीं ययौ। प्रायोपविष्टः अनशनः भुवनेश्वरींआनर्च।५।

नामधारक प्रश्न करीत आहे. 'मागील अध्यायाच्या शेवटी आपण जीभ कापून घेतलेल्याही ब्राह्मणाचा उद्धार केला असे म्हटले. तो जीभ नसलेला कोण? भगवंतांनी त्याचा कसा उद्धार केला? त्या श्रीगुरूंचे कथामृत जितके प्राशन करावे तितकी त्याची गोडी वाढतच जाते. अशी ही अनुपम गुरुलीला मला कथन करावी.'१. सिद्ध मुनी सांगू लागले - श्रीक्षेत्र कोल्हापूर येथे एका ब्राह्मणाला दुर्दैवाने मंदबुद्धी मुलगा झाला. अभ्यासात त्याचे लक्षच लागत नसे. तेव्हां त्याचे शेजारचे व आप्त त्याला अभ्यासाकडे प्रवृत्त करण्यासाठी त्याला म्हणाले, केवळ आहार आणि विहारानेच तुष्ट रहाणारा असा तू केवळ शेपूट आणि शिंगे नसलेला पशूच आहेस. त्यांच्याप्रमाणे तूं गवत खात नाहीस हे त्यांचे सद्भाग्यच होय. (*'साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः। तृणं न खादन्नपि जीवमानः सद्भागधेयं परमं पशूनाम्।। नीतिशतकः १२'*)२. विद्या हा असा खजिना आहे जो चोराला गंवसत नाही; शिष्याला दिला तर कमी न होतां वाढतोच; अकिंचनालाही (ऊनं) श्रेष्ठांमध्ये पूज्य करतो; निर्धनालाही धनी बनवितो. (*'हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम्। कल्पान्तेष्वऽपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनं येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते।।'* नीतिशतकः १६)३. पत्नीप्रमाणे सुख देणारी, आईसारखी सांभाळणारी, देशाविदेशांत कुठेही मित्रासारखी, पित्याप्रमाणे हित करणारी आणि गुरूसारखी बोध देणारी विद्या तूं संपादली नाहीस. तुझा धिक्कार असो.४. अशा रीतीने त्यांच्या निंदेने आणि अपमानाने त्रासून तो भिलवडीला गेला. तिथे आमरण उपोषण करीत त्याने देवी भुवनेश्वरीची उपासना आरंभिली. ५.

**दत्वाऽलब्धप्रसादोऽस्यै जिह्वां छेत्तुं कमुद्यतः । स्वप्ने देव्याह तं दण्डी कृष्णातीरेऽस्ति तं भज ।।६।।**
**इति श्रुत्वा दुःखितोऽपि धृत्यागत्य स सद्गुरुम् । ननामाश्रूत्तगात्रस्तन्मूर्ध्न्यधाच्छ्रीगुरुः करम् ।।७।।**
**स्पर्शेऽयोऽपि यथा हेम हंसः काकोऽपि मानसे । यथा विद्वांस्तथाभूत्स सुजिह्वः स्पर्शनाद्विभोः ।।८।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्कं ध्यायन्त्यङ्घ्र्यब्जमस्य ये । अपैति तत्प्रसादाद्धी-जाड्याद्यं नात्र चित्रमित् ।।९।।**

जिह्वां छेत्तुं दत्वा अलब्धप्रसादः कं (छेत्तुं) उद्यतः। स्वप्ने तं देवी आह। कृष्णा+तीरे दण्डी अस्ति, तं भज।६। इति श्रुत्वा दुःखितः अपि धृत्या अश्रु+उत्त+गात्रः सः सद्गुरुं आगत्य ननाम। तत्+मूर्ध्नि श्रीगुरुः करं अधात्।७। यथा अयः अपि स्पर्शे हेमः, यथा काकः अपि मानसे हंसः तथा सः विभोः स्पर्शनात् सुजिह्वः विद्वान् अभूत्।८। ये अस्य वज्र+अंकुश+ध्वजा+अब्ज+अंकं अंघ्रि+अब्जं ध्यायन्ति तत्+प्रसादात् धी+जाड्यादि अपैति। न अत्र चित्रं इत्।९।

त्याने देवीला आपली जीभ कापून वाहिली तरी ती प्रसन्न झाली नाही. मग तो आपले डोकेच कापायला सिद्ध झाला. इतक्यांत त्याला दैवयोगाने झोप आली. स्वप्नांत त्याला देवीचे दर्शन झाले. ती त्याला म्हणाली, कृष्णेच्या पैलतीरावर एक संन्यासी आहेत. त्यांना तूं शरण जा म्हणजे तुझे काम होईल.६. हे ऐकून तो दुखाने व्याकुळ असूनही अश्रूंनी भिजलेल्या अंगाने धीर धरून सद्गुरूंकडे गेला आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. अशा त्या जीभतुटक्या ब्राह्मणाच्या मस्तकावर श्रीगुरूंनी आपला हात ठेवला.७. परीसाला लागतांच लोखंडाचेही जसे सोने व्हावे, मानस सरोवरांत कावळाही हंस व्हावा तसा भगवंतांच्या स्पर्शाबरोबर त्या ब्राह्मणाची जिह्वा चांगली झाली आणि तो विद्वानही झाला. जीभ चांगली झाली म्हणजे तुटलेली परत पुरती झाली एवढेच नव्हे तर ती उत्तम वक्तृत्वाने आणि सुमधुर आलापांनी संपन्न झाली. आत्मज्ञानाला योग्य अशा कार्यकारणांचा प्रादुर्भाव त्याच्यात झाला. तसेच त्याला व्यावहारिक आणि पारमार्थिक ज्ञानही प्राप्त झाले.८.

**गुर्वाज्ञया गृहं गत्वा सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । भगवांस्तत उत्थाय दक्षिणाभिमुखो ययौ ।।१०।।**
**कृष्णावेणीपञ्चनदी-संगमं सुमनोहरम् । अष्टतीर्थान्वितं पुण्यं दृष्ट्वा तस्थौ परे तटे ।।११।।**
**सरस्वती शिवा भद्रा कुम्भी भोगवतीत्यमूः । कृष्णावेण्योः संगतास्तत्संगमस्तूत्तमोत्तमः ।।१२।।**

द्विजः गुरु+आज्ञया गृहं गत्वा उभयीं सिद्धिं प्राप। भगवान् ततः उत्थाय दक्षिण+अभिमुखः ययौ।१०। कृष्णा+वेणी+पंचनदी+संगमं अष्ट+तीर्थ+अन्वितं पुण्यं सुमनोहरं दृष्ट्वा परे तटे तस्थौ।११। सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती इति अमूः कृष्णावेण्योः संगताः। तत् संगमः तु उत्तम+उत्तमः।१२।

श्रीगुरूंच्या स्पर्शमात्राने त्या ब्राह्मणाची वाचा आणि बुद्धी प्रगल्भ झाल्याचे नवल करण्याचे कारण नाही. ज्या श्रीगुरूंच्या वज्र, अंकुश, पताका आणि कमळ या चिह्नांनी अंकित चरणांचे चिंतन करणाऱ्यांच्या प्रसादानेही बुद्धीचे मांद्य आदींचा निरास होतो, प्रत्यक्ष त्यांचीच कृपा झाल्यावर तो झाला तर आश्चर्य काय?९. तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने आपल्या घरी गेला. तिथे गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून अनासक्त वृत्तीने, ईश्वराच्या प्रीतीकरिता आणि लोकसंग्रहासाठी नित्यनैमित्तिक कर्मे आचरून स्त्री, पुत्र, गृह, धन इत्यादि इह लोकांत उपभोगण्याची (ऐहिक) आणि निरतिशय ब्रह्मानंदरूप आमुष्मिकी अशा दोन्ही प्रकारच्या सिद्धी पावला. भगवान् श्रीगुरूंनी तिथून निघून दक्षिण दिशेकडे प्रस्थान केले.१०. पद्मपुराणांत (उत्तरखंड १११:१३) कृष्णा साक्षात् विष्णूचे रूप आहे तर वेणी ही भगवान शंकरांचे. ह्या दोन नद्यांच्या भेदरहित हरिहरांचे स्वरूप असणाऱ्या कृष्णावेणीचा पंचनद्यांसह झालेला अत्यंत मनोहर, पुण्यप्रद आणि आठ तीर्थांनी युक्त असा संगम पाहून त्याच्या पश्चिम तीरावर औदुंबराच्या तळवटी श्रीगुरूंनी वास केला. ह्यावर श्रीस्वामिमहाराजांनी एक मार्मिक आणि हृद्य रूपक केले आहे. 'अष्टप्रकृतींच्या जुळणीने झालेल्या देहांत चिच्छक्ती आणि जीवशक्ती यांच्या संगमांत म्हणजेच अतीव चित्ताकर्षक आज्ञा चक्राच्या पल्याड ब्रह्मरंध्रांत श्रीगुरू स्थिरावले.

**स्थलं कुरुपुराख्यं तत्कुरुक्षेत्राधिपुण्यदम् । साक्षात्प्रयागोऽयमग्रे काश्याः श्रेष्ठं महास्थलम् ।।१३।।**
**तत्रोदुम्बरकल्पद्रुर्विश्वेट्तुल्योऽमरेश्वरः । योगिन्योऽपि चतुःषष्टिर्नरोऽप्यत्रामरो भवेत् ।।१४।।**
**स्वर्याति ना तपःस्नायी संगतेऽत्र सितासिते । तीर्थान्यवाक्प्रवाहेऽत्र महाघघ्नानि कोटिशः ।।१५।।**

तत् कुरुपुर+आख्यं स्थलं कुरुक्षेत्र+अधि+पुण्यदम्। अग्रे साक्षात् प्रयागः अयं काश्याः श्रेष्ठं महास्थलम्।१३। अत्र सित+असिते संगते तपः+स्नायी ना स्वः याति। अत्र अवाक् प्रवाहे महा+अघ+घ्नानि कोटिशः तीर्थानि।१४। तत्र उदुम्बर+कल्पद्रुः, विश्वेट्+तुल्यः अमरेश्वरः, योगिन्यः अपि (वसन्ति)। अत्र नरः अपि अमरः भवेत्।१५।

तट या शब्दांत जगताच्या उत्पत्ती-स्थिती-लयादि तटस्थलक्षणांचा संकेत आहे.' अथवा **पर** म्हणजे सर्वोत्कृष्ट आणि **अतटे** अर्थात् निस्सीम सच्चिदानंदस्वरूपांत विसांवले असाही अर्थ करतां येईल.११. सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती ह्या पांच नद्या कृष्णा-वेणी यांना येऊन मिळतात तो संगम गङ्गा-यमुना इत्यादि उत्कृष्ट संगमांहूनही उत्तम आहे.१२. कुरुपुर नांवाचे हे क्षेत्र पद्मपुराणाने (स्वर्गखंड २७:९२) तिन्ही लोकांत विशेष मानले आहे. त्यानुसार कुरुक्षेत्राचे माहात्म्य भूलोकांतील सर्व तीर्थांच्या माहात्म्याइतकेच आहे. अशा कुरुक्षेत्राहून हा संगम अधिक पुण्यप्रद आहे. हा साक्षात् प्रयागच आहे. त्याच्यापुढे पूर्वेकडे युगालय (जुगुळ) हे काशीहून श्रेष्ठ महान क्षेत्र आहे.१३. ह्या धवल आणि कृष्ण प्रवाहांच्या संगमांत माघ महिन्यांत स्नान करणारे पुरुष (किंवा स्त्रिया) ऋग्वेदात (१०:७५:५) सांगितल्याप्रमाणे स्वर्गात जातात. दक्षिणाभिमुखी प्रवाहांत शुक्लतीर्थापासून संगमापर्यांत कोटिशः तीर्थे आहेत. छांदोग्य उपनिषदांत (५:१०:९) सांगितलेली सुवर्णचोरी, सुरापान, गुरुतल्प, ब्रह्महत्या आणि त्यांच्यांत सहभाग, ह्या पंचमहापापांचा नाश करणारी आहेत.१४. त्या श्रीगुरूंच्या निवासस्थानी असलेला औदुंबर हा कल्पवृक्षच आहे; पैलतीरावरचा अमरेश्वर हा विश्वेश्वरासमान आहे; तिथेच चौसष्ट योगिनींचाही वास आहे. अशा या पवित्र ठिकाणी राहणारे रागद्वेषादि असलेले मानवही शमदमादि दैवी संपदेने युक्त होतात.१५.

**मुमुक्ष्वाश्वासनं कामि-हितं सत्तमरञ्जनम् । दृष्ट्वाश्रमं मूर्तिमत्स्वं परात्मोदुम्बरे व्यधात् ।।१६।।**
**सद्विद्याढ्यामरपुरं प्राङ्निरीक्ष्यैत्य तत्र सः । स्वाचारं वैदिकं दीनं प्रभुर्भिक्षां स्म याचते ।।१७।।**
**भिक्षावृत्तेस्तदा साध्वी सात्त्विकस्य कुटुम्बिनी । अन्नाभावाद्ददौ शाकमातिथेयी तु भिक्षवे ।।१८।।**
**भक्त्यार्पितमपि प्राश्य शाकं संतृप्त ईश्वरः । तत्र शाकलतां दृष्ट्वा तामुत्पाट्याश्रमं ययौ ।।१९।।**
**तदा स्त्रीर्दुःखिता प्राह योगक्षेमकरी कुतः । उन्मूलिता लता नैव भिक्षाशाठ्यं मया कृतम् ।।२०।।**

मुमुक्षु+आश्वासनं, कामि+हितं, सत्+तम+रंजनं आश्रमं दृष्ट्वा परात्मा स्वं उदुम्बरे व्यधात्।१६। सत्+विद्या+आढ्य+अमरपुरं प्राक् निरीक्ष्य तत्र सः प्रभुः वैदिकं सु+आचारं दीनं भिक्षां याचते स्म।१७। तदा भिक्षा+वृत्तेः सात्त्विकस्य साध्वी कुटुम्बिनी भिक्षवे अन्न+अभावात् आतिथेयी शाकं ददौ।१८। भक्त्या अर्पितं शाकं अपि प्राश्य संतृप्तः ईश्वरः तत्र शाकलतां दृष्ट्वा तां उत्पाट्य आश्रमं ययौ।१९। तदा स्त्रीः दुःखिता प्राह, योग+क्षेम+करी लता कुतः उन्मूलिता? मया भिक्षा+शाठ्यं नैव कृतम्!२०।

मुमुक्षूंना आश्वासन देणारा, सकाम भक्तांचे इच्छापूर्तिरूप हित करणारा, संतसज्जनांना परमानंदाने रमविणारा तो आश्रम पाहून परमात्मरूप सद्गुरूंनी आपल्या स्वरूपाची तिथे विशेषत्वाने स्थापना केली.१६. सत् म्हणजे परा विद्या अभ्यासणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती असलेले अमरापूर पूर्वतीरावर पाहून तो मानवरूप भगवंत आचारसंपन्न, वैदिक आणि नम्र अशा एका ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागायला गेला.१७. तेव्हां यायावर वृत्तीने (भिक्षा मागूनच) निर्वाह करणाऱ्या त्या सात्त्विक ब्राह्मणाच्या साध्वी पत्नीने घरांत कांहीच अन्न नसल्याने त्या यतिवेषधारी श्रीगुरूंना (घेवड्याच्या शेंगांची) भाजी अतिथीला योग्य समजून वाढली.१८. भक्तीने अर्पण केलेली ती भाजी सेवन करूनच भगवंत तृप्त झाले. तिथून जातांना त्यांनी अंगणांत पसरलेला घेवड्याचा वेल उपटून टाकला आणि ते आपल्या आश्रमांत परतले.१९. तेव्हां ती ब्राह्मणी कळवळून आपल्या पतीला म्हणाली, 'अहो पहा तरी! त्या संन्याशाने आपला चरितार्थ चालविणारा घेवड्याचा वेल कसा उपटून टाकला! घरात खरेच कांही दुसरे नसल्याने मी त्यांना भाजी वाढली. त्यांना चाळविण्याचा माझा हेतू नव्हता.'२०.

**तां भर्तोचे मौनमेहि न कोऽपि सुखदुःखदः । लोकाः स्वकर्मसूत्रोता वृथाहङ्कारसंश्रिताः ।।२१।।**
**ईशाधीनं जगत्सर्वं येनाप्तव्यं तु यत्ततः । कोऽपि नेशोऽन्यथा कर्तुमायुश्चान्नं स यच्छति ।।२२।।**
**विश्वोद्भवलयत्राण-निदानस्यास्य चैकदृक । प्राज्ञेऽज्ञे राज्ञि रङ्केऽपि मा शुचस्तारकोऽस्त्ययम् ।।२३।।**

भर्ता तां ऊचे, मौनं एहि। न कः अपि सुख+दुःख+दः। लोकाः स्व+कर्म+सूत्र+उताः वृथा+अहंकार+संश्रिताः।२१। सर्वं जगत् ईशाधीनम्। येन यत् आप्तव्यं तत् अन्यथा कर्तुं तु कः अपि न ईशः। सः आयुः अन्नं च यच्छति।२२। विश्व+उद्भव+लय+त्राणस्य अस्य प्राज्ञे, अज्ञे, राज्ञि, रंके च अपि एक+दृक्। मा शुचः। अयम् तारकः अस्ति।२३।

पतीने तिला शांत राहायला सांगितले आणि म्हणाला, 'या जगांत कुणी कुणाला सुख वा दुःख देत नसते. आपल्या कर्माच्या धाग्यांत गुंतून सुख-दुःखांचा भोग घेणारे लोक कर्मपरतंत्र असूनही व्यर्थ मीपणा मिरवतात.' (*'सुखस्य दुःखस्य न कोपि दाता, परो ददातीति कुबुद्धिरेषा। अहं करोमीति वृधाभिमानः, स्वकर्मसूत्रे ग्रथितो हि लोकः।।' अध्यात्मरामायण* २:६:६) दुसऱ्याला बोल लावूं नये, त्यांचे दोष प्रकट करूं नयेत असा त्याचा अभिप्राय. 'वृद्ध मातापिता, साध्वी पत्नी, तान्हे मूल यांच्या पोषणासाठी शंभर दुष्कृत्येही करावी लागली तरी करावीत,' असे मनूचे (मनुस्मृति परिशिष्ट) सांगणे आहे. 'ते माझ्यासाठी असूनही मी दुःख करीत नाही. तूं तर पत्नी आहेस आणि तुझ्यावर कुणाच्याही पोषणाची जबाबदारी नाही. मग तूं का शोक करतेस?' पाप करणाऱ्याला जी गती तीच त्याचे पाप बोलून दाखविणाऱ्याची होते. यासाठी पत्नीला गप राहायला त्याने सांगितले.२१. 'हे सर्व जग ईश्वराधीन आहे. ज्याला जे कांही सुख वा दुःख मिळायचे असते तेच त्याला ब्रह्मसूत्रांच्या सिद्धांतानुसार परमात्माच (३:२:३८) देतो. त्यांत कुणीही बदल करूं शकत नाही. तोच आयु आणि अन्नही देतो.२२. सकल विश्वाचा जनक, पालक आणि संहारक अशा त्या परमेश्वराची शहाणा वा निर्बुद्ध, राजा वा रंक या सर्वांवर एकसारखीच कृपादृष्टी असते. तूं शोक करूं नकोस. (शोक म्हणजे आपल्याला हव्याशा वस्तू, माणसे इत्यादींच्या वियोगाने होणारा मनाचा संताप) हा प्रभूच तारणहार आहे.'२३.

**इत्याश्वास्य वधूं विप्रो मूलमुत्खाय तत्र सः । अर्थपूर्णं घटं लेभे सद्गुरोः संप्रसादतः ।।२४।।**
**सभार्योऽथ द्विजो गत्वा शशंस गुरवे तु तत् । स प्राह दम्पती गोप्यमिदं श्रीर्नान्यथा ध्रुवा ।।२५।।**
**ऐश्वर्यपुत्रपौत्राढ्यौ संभूयात्र निरामयौ । मोक्षं गमिष्यथो नूनं गन्तव्यं सुखमालयम् ।।२६।।**

इति वधूं आश्वास्य विप्रः मूलं उत्खाय तत्र सः सद्गुरोः संप्रसादतः अर्थपूर्णं घटं लेभे।२४। अथ द्विजः सभार्यः गुरवे गत्वा तत् तु शशंस। सः प्राह, (हे) दम्पती, इदं गोप्यम्। अन्यथा श्रीः न ध्रुवा।२५। अत्र ऐश्वर्य+पुत्र+पौत्र+आढ्यौ निरामयौ संभूय नूनं मोक्षं गमिष्यथः। सुखं आलयं गन्तव्यम्।२६।

अशी आपल्या बायकोची समजून काढून त्याने तोडलेल्या वेलीचे मूळ खोदून काढले. तिथे त्या सद्गुरूंच्या मंगल प्रसादाने द्रव्याने भरलेला घडा मिळाला. इथे अशी शंका उपस्थित होते की अर्थ म्हणजे धन हे अनर्थाचे मूळ आहे असे असतां तो सद्गुरूंचा मंगल प्रसाद कसा मानावा? अर्थ हा अनर्थ आहे खरा; पण तो विषयभोगांत आसक्त असणाऱ्यांना किंवा कवडीचुंबकांना. चित्त शुद्ध असणाऱ्या भगवद्भक्तांना तेच धन यज्ञादि सत्कर्मांनी दैवी संपत्तीच्या प्राप्तीचे साधन होतो. यासाठी तो श्रीगुरूंचा संप्रसाद म्हटलेला आहे.२४. मग तो ब्राह्मण आपल्या पत्नीसह श्रीगुरूंकडे गेला. त्याने आपल्याला धन प्राप्त झाल्याचे त्यांना सागितले. त्यावर ते म्हणाले, 'तुम्ही उभयतांनी ही गोष्ट गुप्त ठेवावी. अन्यथा ही लक्ष्मी टिकणार नाही.२५. इथे भूलोकी पुत्र-पौत्रांसह ऐश्वर्य तसेच आरोग्य भोगून अंती निश्चितपणे मुक्ती पावाल.' या वेळी त्या दंपतीने श्रीगुरूंच्या चरणांशीच राहून सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावर त्यांना 'आतां सुखाने घरी जा,' असे सांगून निरोप दिला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ते पती-पत्नी आपल्या घरी गेले आणि श्रीगुरूंच्या आशीर्वचनाप्रमाणेच ऐहिक भोग भोगून अंती मोक्ष पावले.२६.

॥ नामधारक उवाच ॥

**भिक्षावृत्तिः प्रभोः कस्मात्कल्पद्रुम उदुंबरः । सति पूज्यतमेऽश्वत्थे कुतो भगवता श्रितः ॥२७॥**

॥ सिद्ध उवाच ॥

**पक्वान्नभिक्षुको भिक्षुरिति श्रुतमतं प्रभुः । भिक्षुः सन्लीलया भेजे शम्भुवृत्तिरियं पुनः ॥२८॥**

नामधारक उवाच। 'प्रभोः भिक्षावृत्तिः कस्मात्? उदुंबरः कस्मात् कल्पद्रुमः? पूज्यतमे अश्वत्थे सति भगवता (उदुंबरः) कुतः श्रितः?'२७। प्रभुः लीलया भिक्षुः सन् भिक्षुः पक्वान्नभिक्षुकः इति श्रुतमतं भेजे। पुनः इयं शम्भु+वृत्तिः।२८।

ही कथा ऐकल्यावर नामधारकाने आपल्या मनांत उठलेले तीन प्रश्न सिद्धमुनींना विचारले आहेत. 'आपल्या भक्तांना सर्व ऐश्वर्याचे दान करणारे प्रभू भिक्षावृत्तीचा अवलंब कां करतात? औदुंबर वृक्षाला कल्पवृक्षाची योग्यता कशी आली? तसेच स्वतः भगवंतांनी आपली विभूती म्हणून गौरविलेला पिंपळ (भ.गीता ११:२६) सोडून उंबराचा आश्रय कां घेतला?'२७. **प्रभूंची भिक्षावृत्ती -** भगवंतांनी लीलेने यतिवेष घेतला असल्याने आणि संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी सिद्ध अन्नाची भिक्षा मागावी (पराशर स्मृति १:४६) अशा श्रवणाने झालेल्या मताचा अंगीकार केला. **श्रुतमत** म्हणजे बृहदारण्यक उपनिषदाचे आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी पुत्रैषणा, वित्तैषणा, लोकैषणा या तिन्हींचा परित्याग करून भिक्षेची वृत्ती अवलंब करावी हे मत (३:५:१) असाही होतो. याशिवाय शं म्हणजे सुख ते जिच्यापासून होते ती शंभू वृत्ती; अर्थात् सुखपर्यवसायी वृत्ती. *'भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः। भिक्षाहारी प्रकुरुते सोमपानं दिने दिने॥'* (भिक्षान्न सेवन करणारा हा निराहारी असतो. भिक्षा हा प्रतिग्रह मुळीच नाही. भिक्षेवर निर्वाह करणारा प्रतिदिन सोमपान करतो.) अशी स्मृति आहे. श्रीदासबोधांत समर्थ रामदासस्वामी म्हणतात, *'भिक्षा मागोन जो जेविला। तो निराहारी बोलिला। प्रतिग्रहावेगळा जाला। भिक्षा मागतां॥२॥ संतासंत जे जन। तेथें कोरान्न मागोन करी भोजन। तेणें केलें अमृतप्राशन। प्रतिदिनीं॥३॥'* (१४:२).२८.

**नखा नृसिंहावतारे विषार्ता दैत्यदारणात् । शान्ता औदुम्बरैः सोऽथ प्रीत्यानेन सदाश्रितः ।।२९।।**
**यत्र क्वाप्येष कल्पद्रुर्भूयात्तापाघदैन्यहृत् । कामदोऽहं श्रियात्रासमिति तस्मै वरोऽर्पितः ।।३०।।**
**विश्वात्मा यत्र तत्रैव वेदतीर्थामरा अपि । सन्त्युदुम्बर एवात्र कल्पद्रुर्भुवि नापरः ।।३१।।**
**तस्मादुदुम्बरतले भिक्षां कुत्रापि विश्वभृत् । अकृत्वा कामरूपाभिर्योगिनीभिः स्थितोऽर्चितः ।।३२।।**
**अज्ञानावृतविप्रास्तदज्ञात्वोचुः परस्परम् । कथं जीवत्यकृत्वायं भिक्षां मृग्यं तदद्य हि ।।३३।।**

नृसिंह अवतारे नखा दैत्य+दारणात् विष+आर्ताः (अभूवन्)। औदुम्बरैः शांता (जाताः)। अथ सः अनेन प्रीत्या सदा आश्रितः।२९। यत्र क्व अपि एष कल्प+द्रुः पाप+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात्। कामदः अहं श्रिया अत्र आसम् इति वरः तस्मै अर्पितः।३०। यत्र विश्व+आत्मा तत्र एव वेद+तीर्थ+अमराः अपि सन्ति। अत्र भुवि उदुम्बर एव कल्प+द्रुः न अपरः।३१। तस्मात् विश्व+भृत् कुत्र अपि भिक्षां अकृत्वा काम+रूपाभिः योगिनीभिः अर्चितः उदुम्बर+तले स्थितः।३२। अज्ञान+आवृत+विप्राः तत् अज्ञात्वा परस्परं ऊचुः। अयं भिक्षां अकृत्वा कथं जीवति? तत् अद्य हि मृग्यम्।३३।

**औदुंबरमाहात्म्य -** आतां सिद्धमुनि दुसऱ्या - औदुम्बरसंबंधी प्रश्नाचे उत्तर देत आहेत. नरसिंह अवतारांत ह्या भगवंताची नखे हिरण्यकशिपूचे पोट फाडतांना त्यांतील दाहक विषाने भाजली. त्या वेळी लक्ष्मीमातेने आणलेल्या उंबराच्या फळांनी तो दाह शमून नखे शांत झाली. तेव्हांपासून औदुम्बर वृक्ष देवाला प्रिय झाला आणि ते सदा त्याच्याखाली राहूं लागले.२९. जेथे कुठे - वाडीत, खेड्यांत, क्षेत्रांत, हा कल्पवृक्ष असेल तिथे तो पाप, ताप, दैन्य यांचा हारक होईल. भक्तांच्या कामना पुरविणारा मीहि, लक्ष्मीसह तेथे वास करीन असा वर त्या वृक्षाला देवाने दिला. विश्वात्मा हरी जिथे राहतो त्या औदुम्बरांतच वेद, तीर्थे आणि देवांचाही वास आहेच. त्यामुळे ह्या पृथ्वीतलावर औदुम्बरच कल्पवृक्ष आहे. दुसरा कोणताही वृक्ष नाही.३१. त्यामुळे, किंवा अमरापुरांत घेवड्याच्या भाजीची भिक्षा केल्या दिवसापासून, विश्वंभर श्रीगुरू कुठेही भिक्षा न घेतां औदुंबराच्या तळवटीच इच्छेप्रमाणे रूप धारण करणाऱ्या चौसष्ट योगिनींची पूजा घेत राहिले.३२. त्या गांवच्या अज्ञानी ब्राह्मणांना हे न कळल्यामुळे ते परस्परांत बोलूं लागले, 'हा संन्यासी भिक्षेवांचून कसा जगतो याचा आजच शोध घेऊं या!'३३.

**इत्थं विचार्य तस्थुस्ते मध्याह्ने योगिमायया । त्रस्ता ग्रामं ययुः कोऽपि ज्ञातुं शक्योऽस्य चेष्टितम् ।।३४।।**
**श्रीगुरुं द्रष्टुमागत्य भाविको भक्तिभावनम् । गङ्गानुजाख्यभक्तोऽत्र दृष्टवान् चित्रमेकदा ।।३५।।**
**जलपूर्णाऽपि कृष्णाऽदान्मार्गं तेनागमत्प्रभुः । ददर्शान्वेत्य भक्तोऽपि पुरीं दिव्यामिवान्तरे ।।३६।।**
**नीराजितो योगिनीभी रत्नसिंहासनस्थितः । स्वर्चितः प्रेक्ष्य तं देवः प्राह कोऽस्यागतः कुतः।।३७।।**

इत्थं विचार्य ते विलीय तस्थुः। मध्य+अह्ने योगि+मायया त्रस्ता ग्रामं ययुः। अस्य चेष्टितं कः अपि ज्ञातुं शक्यते?३४। एकदा गङ्गानुज+आख्यः भाविकः भक्तः भक्तिभावनं श्रीगुरुं द्रष्टुं आगत्य चित्रं दृष्टवान्।३५। जलपूर्णा अपि कृष्णा मार्गं अदात्। तेन प्रभुः आगमत्। अनु एत्य भक्तः अपि अंतरे दिव्यां इव पुरीं ददर्श।३६। रत्नसिंहासनस्थः स्वर्चितः योगिनीभिः नीराजितः देवः तं प्रेक्ष्य प्राह, 'कः असि? कुतः आगतः?'३७।

असा विचार करून ते ब्राह्मण श्रीगुरूंवर लक्ष ठेवून लपून बसले. पण दुपारच्या वेळी ईश्वराच्या मायेने भ्रमित होऊन घाबरून घरी गेले. ह्या भगवंताची लीला कधी कुणाला जाणतां आली आहे काय?३४. एकदां गंगानुज नांवाचा एक भाविक भक्त, भक्तिगम्य श्रीगुरूंच्या दर्शनासाठी आला असतां त्याने एक चमत्कार पाहिला.३५. कृष्णा नदी पाण्याने दुथडी भरलेली असूनही तिने श्रीगुरूंना वाट करून दिली आणि त्या मार्गाने प्रभू आत गेले. भक्तही त्यांच्या मागे गेला असतां त्याने नदीच्या आंत एक जणु बेट आहे आणि त्यावर एक अमरावतीसारखी दिव्य नगरी पाहिली.३६. तिथे चौसष्ट योगनींनी श्रीगुरूंना रत्नजडित सिंहासनावर बसवून त्यांची पूजा आणि आरती केलेली त्याने पाहिली. इतक्यांत श्रीगुरूंनी त्याला पाहिले आणि विचारले की, 'तूं कोण आहेस? आणि इथे कशासाठी आला आहेस?' ३७.

**।। गङ्गानुज उवाच ।।**

**गङ्गानुजाभिधोऽहं त्वामत्रत्यो द्रष्टुमन्वगाम् । भवान्परात्मा सर्वेशो दैवान्मेऽद्यात्र गोचरः ।।३८।।**
**त्वन्मायामोहितात्मानस् त्वां विदुः केवलं नरम् । संसारसागरेऽपारे तेऽतो मज्जन्ति नेतरे ।।३९।।**
**इति प्रेम्णा स्तुतस्तस्मै हृद्यं दत्वेश्वरोऽब्रवीत् । मयि सत्यत्र यद्दृष्टं नाख्येयं कस्यचित्त्वया ।।४०।।**

'अहं गङ्गानुज+अभिधः अत्रत्यः त्वां द्रष्टुं अनु अगाम्। भवान् परात्मा सर्वेशः मे अद्य अत्र दैवात् गोचरः (जातः)'।३८। 'त्वत्+माया+मोहित+आत्मानः (ये) त्वां केवलं नरं विदुः ते अपारे संसार+सागरे मज्जन्ति। न इतरे।'३९। इति प्रेम्णा स्तुतः ईश्वरः तस्मै हृद्यं दत्वा अब्रवीत्। 'त्वया यत् दृष्टं मयि अत्र सति न कस्यचित् आख्येयम्।'४०।

'माझे नांव गंगानुज असून मी याच गांवचा (औरवाडचा) राहणारा आहे. आपल्या दर्शनासाठी आपल्या मागे आलो. आपण साक्षात् परमात्मा आणि परमेश्वर आहांत. माझ्या पूर्वपुण्याईच्या परिपाकाने जागलेल्या अनन्य भक्तीमुळे मला आज या ठिकाणी आपले दर्शन झाले आहे.' गंगानुजाला असे दुर्लभ दर्शन होण्याचे कारण श्रीस्वामिमहाराज श्रीमद्भगवद्गीतेच्या (८:२२) आधारे देत आहेत. 'हे अर्जुना, तो परम पुरुष केवळ अनन्य भक्तीनेच पावतो.' (*'पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।'*)३८. 'तुझ्या मायेने ज्यांच्या मनाला मोह झालेला आहे त्यामुळे जे अज्ञानवश तुला केवळ मानव समजतात ते ह्या दुस्तर संसारसागराचा पार (ब्रह्म) न पावल्याने त्यांतच गटांगळ्या खातात. इतर तुझे स्वरूप जाणणारे तुझे भक्त मात्र संसारसागर तरून जातात.'३९. अशा प्रेमभराने केलेल्या स्तुतीने प्रसन्न होऊन श्रीगुरुस्वरूप ईश्वराने त्याला त्याचा अभीष्ट वर देऊन सांगितले की, 'तूं हे जे आज इथे पाहिलेस ते मी या ठिकाणी (ह्या रूपाने) असेपर्यंत कुणालाही सांगूं नकोस.' मी इथून गेल्यावर मात्र सांगायला हरकत नाही असे अर्थातच यांत सूचित केले आहे.४०.

**इत्युक्तो गुरुणा हृष्टो भक्तः क्षेत्रं स्वमेत्य सः । लेभेऽसम्भाव्यसस्यर्धिं लोके श्रैष्ठ्यं च संविदम् ।।४१।।**
**स एत्य नित्यमानर्च गुरुं प्राहैकदा गुरो । काश्यां तु त्रिस्थलीयात्रा वरेत्याहुर्न वेद्मि ताम् ।।४२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**प्रयागः संगमः काशीयं गया करवीरपूः । दर्शयामीदमेतद्वत् त्रिस्थलं ते द्रुतं परम् ।।४३।।**
**इत्युक्त्वा धारयित्वा स्वपादुके त्रिस्थलीं त्विमाम् । प्रयागकाश्यौ गयां च दर्शयित्वागमत्क्षणात् ।।४४।।**

इति गुरुणा उक्तः हृष्टः सः भक्तः स्वं क्षेत्रं एत्य असम्भाव्य+सस्य+ऋद्धिं, लोके श्रैष्ठ्यं संविदं च लेभे।४१। सः नित्यं गुरुं एत्य आनर्च। एकदा सः प्राह, '(हे) गुरो! काश्यां त्रि+स्थली+यात्रा तु वरा इति आहुः। तां न वेद्मि।'४२। श्रीगुरुः उवाच। '(अयं) संगमः प्रयागः, इयं काशी, करवीरपूः गया। इदं दर्शयामि। एतत्+वत् (अ)परं त्रिस्थलं ते द्रुतं दर्शयामि।'४३। इति उक्त्वा स्वपादुके धारयित्वा, 'इमां त्रिस्थलीं तु', प्रयाग+काश्यौ गयां च क्षणात् दर्शयित्वा आगमत्।४४।

श्रीगुरूंशी असा संवाद केल्यावर आनंदभरित झालेला तो भक्त आपल्या शेतीवर परतला. त्याच्या शेतांत त्याला कल्पनेबाहेर पीक आले. समजांतही त्याला मानमान्यता मिळाली आणि आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक करणारी बुद्धी प्राप्त होऊन तो ब्रह्मज्ञानी झाला.४१. तो गंगानुज नांवाचा शेतकरी रोज औदुंबराला येऊन श्रीगुरूंची पूजा करीत असे. एकदां त्याने त्यांना प्रश्न केला, 'गुरुमहाराज, काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा श्रेष्ठ आहे असे म्हणतात ती मी जाणत नाही.' काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा नाही; पण त्याच्याच पुढील बोलण्यावरून तो अज्ञानानेच तसे बोलतो आहे हे स्पष्ट आहे.४२. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'हा कृष्णापंचगंगासंगमच प्रयाग आहे; त्यापुढे कृष्णेतील युगालय नावाचे क्षेत्र हीच काशी आहे; तसेच कोल्हापूर हीच गया आहे. ही त्रिस्थळी तुला दाखवितो. तशीच दुसरीही त्रिस्थळीही लगेच दाखवितो.'४३. असे बोलून आणि त्याला आपल्या पादुका धरायला लावून त्याला योगगतीने नेऊन ही (संगम-युगालय-कोल्हापूर) त्रिस्थळी तर दाखविलीच पण प्रयाग, काशी आणि गया ह्या ठिकाणीही नेऊन तीसुद्धा त्रिस्थळी यात्रा घडविली आणि क्षणांत परत संगमावर आपल्या आश्रमांत आणून सोडले.४४.

**तमाह त्रिस्थली त्वेषा दर्शितान्यापि तादृशी । साम्यं ज्ञात्वोभयोरत्र स्वाचारान्मुक्तिमेष्यसि ।।४५।।**
**इति योगीशवाक्यं स श्रुत्वा ज्ञात्वाऽस्य चेष्टितम् । तद्ध्यानात्कर्मबन्धं द्राक् छित्वा मुक्तो बभूव ह ।।४६।।**
**वृद्धोऽत्र महिमा सन्त आयास्यन्तीतरेऽप्यतः । गन्तव्यं क्वापि न स्थेयं साक्षादत्रेत्यमंस्त सः ।।४७।।**

तं आह, 'एषा तु त्रिस्थली दर्शिता, अन्या अपि तादृशी (दर्शिता)। उभयोः साम्यं ज्ञात्वा अत्र स्व+आचारान् मुक्तिं एष्यसि।'४५। इति योगी+ईश+वाक्यं श्रुत्वा, अस्य चेष्टितं ज्ञात्वा, तद्+ध्यानात् कर्म+बन्धं द्राक् छित्वा मुक्तः बभूव ह ।४६। अत्र महिमा वृद्धः। सन्तः, इतरे अपि आयास्यन्ति। अतः अत्र साक्षात् न स्थेयं (अन्यत्र) क्व अपि गन्तव्यं इति सः अमंस्त।४७।

मग श्रीगुरु त्या गंगानुजाला म्हणाले, 'तुला ही त्रिस्थळी आणि तशीच दुसरीही त्रिस्थळी दाखविली. या दोन्हींचे साम्य जाणून तूं आपला विहित आचार करून मुक्ती पावशील.' स्वाचार शब्दाने इथे शास्त्रानुसार विहित आचाराचे निष्काम अनुष्ठान अभिप्रेत आहे.४५. असे त्या योगिराज श्रीगुरूंचे वचन ऐकून, त्यांच्या अलौकिक लीलांचे चिंतन आणि श्रीगुरूंचे ध्यान ह्यांच्या प्रभावाने आपल्या कर्मबंधनाचा शीघ्रच छेद करून तो गंगानुज मुक्त झाला.४६. 'इथे महिमा खूपच वाढला आहे. आतां साधुजनांबरोबरच इतरही मतलबी लोकांची गर्दी वाढेल. तरी आपण आतां इथे ह्या प्रत्यक्ष रूपाने न राहतां अन्यत्र कुठे तरी जावे,' असा त्यांनी (श्रीगुरूंनी) विचार केला. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२३) तर 'या ब्रह्मनिष्ठाचा महिमा नित्य आहे तो कर्मामुळे न वाढतो न घटतो,' असे म्हटले आहे. मग इथे महिमा वाढला हे म्हणणे त्याशी विसंगत नाही कां? ह्या आक्षेपाचे उत्तर श्रीस्वामिमहाराजांनी असे दिले आहे की, सच्चिदानंदस्वरूप निर्गुण ब्रह्माच्या महिमानाची कर्मामुळे वृद्धी वा क्षय होत नाही हे खरेच आहे. सगुण ब्रह्माच्या विषयी मात्र लोकांना जसजसे अनुभव येतात त्यानुसार तसतसे त्यांच्या लेखी माहात्म्य वाढते. वस्तुतः श्रुतीचेच प्रतिपादन सयुक्तिक आहे.४७.

**नो हित्वाद्य क्व यासीति विलपन्तीः स योगिनीः । आश्वास्योचेऽत्र तिष्ठामि लोकदृष्ट्या गमिष्य इत् ।।४८।।**
**अमरेशोऽन्नपूर्णात्र विघ्नेशो युष्मदादयः । भक्तेष्टदा मयाऽप्यत्र स्थेयं वस्तुष्टये सदा ।।४९।।**
**इतः प्रभृत्यदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति । बहुलोकनिवासोऽत्र यास्यन्त्यत्र जनाः सुखम् ।।५०।।**

नः हित्वा क्व यासि? इति विलपन्तीः योगिनीः सः आश्वास्य ऊचे, लोकदृष्ट्या गमिष्ये, अत्र तिष्ठामि।४८। इतः प्रभृति अदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति। बहुलोकनिवासः। जनाः सुखं यास्यन्ति। ४९। अत्र अमरेशः, अन्नपूर्णा, विघ्नेशः, युष्मदादयः भक्त+इष्टदाः। वः तुष्टये मया अपि अत्र सदा स्थेयम्।५०।

श्रीगुरूंच्या ह्या संकल्पाने दुःखित झालेल्या योगिनींनी कळवळून त्यांना विनविले, 'आम्हांला सोडून कुठे जातां?' त्यावर त्यांची समजूत घालीत श्रीगुरू म्हणाले, 'योगिनींनो, मी मानवरूपाने अवतार घेतला आहे त्यानुसार लोकांच्या दृष्टीने मी जात असलो तरी खरोखर मी इथेच तुमच्याजवळ राहणार आहे. मी सर्वव्यापी असल्याने माझे कुठे जाणे वा येणे संभवतच नाही.'४८. इथून पुढे हे क्षेत्र सुप्रसिद्ध होईल. इथे खूप लोक राहतील. दुःखी असलेले लोकही इथे येऊन त्या स्थानाच्या प्रभावाने सुख पावतील. **सुखं** या शब्दाचा अर्थ इथे परमानंद किंवा ब्रह्मानंद असा केला आहे. ह्याला छांदोग्य उपनिषदाचा (४:१०:५) आधार घेतला आहे. *'यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव खं'* जे आकाश ते सुख म्हणजे आकाशविशिष्ट सुख. यांत अन्य इंद्रियजन्य सुखाचा अंतर्भाव होत नाही. जसे नीलकमल असे म्हटल्यावर निळ्या नसणाऱ्या, लाल-पिवळ्या कमळांचा अंतर्भाव होत नाही. *'यदेव खं तदेव खं'* या पदांत सुखाला आकाशाचे विशेषण करून सुखविशिष्ट आकाश हे भौतिक अचेतन आकाशापेक्षां भिन्न दाखविले आहे. यांवरून हार्दाकाशाचा किंवा अंतराकाशाचा बोध होतो. अंतराकाशांत अनुभवाला येणारे अतींद्रिय सुख म्हणजेच ब्रह्मानंद असा निष्कर्ष निघतो.४९. इथे अमरेश्वर, अन्नपूर्णा, विघ्नराज आणि योगिनीप्रमुख तुम्ही सर्व देवता भक्तांच्या इष्ट कामना पुरवीत असाल. तुमच्या संतोषासाठी मलाही सदैव इथे राहावेच लागेल.५०.

सन्निपाताक्षिरुङ्मेह-कुष्ठश्लेष्मक्षयज्वरान् । वातपैत्तिकगुल्माद्यान् देशाद्युत्थान्हरेदिदम् ।।५१।।
पुत्रं वन्ध्याऽभयं त्रस्तो निःस्वः स्वं रोग्यनामयम् । मुमुक्षुः सद्गतिं यद्यद्यस्येष्टं स लभेत्सदा ।।५२।।
सहस्रगोदानफलं पर्वक्रान्तिग्रहाप्लुतौ । नुः कोटिफलमत्राल्प-जपहोमसुरार्चनैः ।।५३।।
प्रदक्षिणाऽश्वमेधादि-फलदा नुः पदे पदे । दुर्गताः पितरोऽप्यत्र श्राद्धाद्यान्ति परां गतिम् ।।५४।।
इत्याश्वास्य स योगिनीः परतरः कल्पद्रुमूलेऽमले । संस्थाप्य स्वसुपादुके नर इह स्नात्वार्चयेदष्टसु ।।
तीर्थेष्वीश्वरयोगिनीसुरयुते मत्पादुके द्राग्लभेत् । सोऽभीष्टं त्विति ताः प्रभाष्य स ययौ भीमातटं योगिराट् ।।५५।।

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे कृष्णापञ्चनदीसङ्गमोत्कर्षकथनं नामैकादशोऽध्यायः ।।११।।**

सन्निपात+अक्षिरुक्+मेह+कुष्ठ+श्लेष्म+क्षय+ज्वरान् वात+पैत्तिक+गुल्म+आद्यान् देशादि उत्थान् इदं हरेत्।५१। वन्ध्या पुत्रं, त्रस्तो अभयं, निःस्वः स्वं रोगी अनामयं, मुमुक्षुः सद्गतिं, यत् यत् यस्य इष्टं सः सदा लभेत्।५२। पर्व+क्रान्ति+ग्रह+आप्लुतौ सहस्र+गो+दान+फलम्। अत्र अल्प+जप+होम+सुर+अर्चनैः नुः कोटिफलम्।५३। प्रदक्षिणा नुः पदे पदे अश्वमेधादि फलदा। दुर्गताः पितरा अपि अत्र श्राद्धात् परां गतिं यान्ति।५४। इति योगिनीः आश्वास्य सः परतरः अमले कल्पद्रु+मूले स्व+सुपादुके संस्थाप्य, '(यो) नरः इह अष्टसु तीर्थेषु स्नात्वा ईश्वर+योगिनी+सुर+युते मत्पादुके अर्चयेत् सः द्राक् अभीष्टं लभेत्।' इति ताः प्रभाष्य सः योगिराट् भीमा+तटं ययौ।५५।

सन्निपात, नेत्ररोग, मूत्रविकार, कुष्ठ, कफ, क्षय, ज्वर, वात, पित्त, गुल्म इत्यादि विकार तसेच महामारीसारखे सांसर्गिक रोगही ह्या क्षेत्राच्या प्रभावाने कसल्याही चिकित्सेविना दूर होतील.५१. वांझेला मूल, पीडिताला अभय, निर्धनाला धन, रोग्याला आरोग्य, मुमुक्षूंना सद्गती, ज्याला ज्याला ज्याची इच्छा असेल ते त्याला नेहमीच लाभेल.५२. दर्शादि पर्वकाळी, मेषादि रविसंक्रमणांत, सूर्य-चंद्रग्रहणांत इथे स्नान केल्याने हजार गाई दान केल्याचे फळ लाभेल. थोड्याही प्रमाणांत केलेल्या जप, होम आणि देवपूजा यांचे कोटीपट फळ मनुष्याला लाभेल.५३. येथे प्रदक्षिणा

केल्याने पुरुषाला पावलोपावली अश्वमेधादि यज्ञाचे फळ मिळेल. एखाद्याचे पितर जरी नरकात असतील तरी इथे श्राद्ध केल्याने त्यांना उत्तम गती मिळेल.५४. असे त्या योगिनींना आश्वासन देऊन त्या परमात्म्याने औदुंबराच्या तळवटी आपल्या मनोहर पादुकांची स्थापना केली आणि म्हणाला, 'जो कोणी पुरुष (स्त्री) ह्या क्षेत्रांत अष्टतीर्थांत स्नान करून अमरेश्वर, चौसष्ट योगिनी आणि इतर देवतांची पूजा करील त्याच्या मनोकामनांची शीघ्र पूर्ती होईल.' मग ते योगिराज भीमातीरावर गाणगापूर येथे गेले.५५.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा अकरावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# द्वादशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**गतेऽपि भगवत्यङ्ग कृष्णावेणीतटाश्रमात् । तस्मात्तत्रैव भजतां कार्यसिद्धिः कुतो वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गतिस्थित्यासनस्वप्ना न कदापि चिदात्मनि । लीलेयं मानुषी तस्य नरानुकृतिकारणः ।।२।।**

नामधारक उवाच। 'हे अङ्ग! भगवति कृष्णावेणी+तट+आश्रमांत् गते अपि तत्र एव भजतां कस्मात् कुतो कार्यसिद्धिः? वद।१।
गति+स्थिति+आसन+स्वप्नाः चित्+आत्मनि कदा+अपि न। इयं तस्य नर+अनुकृति+कारणः मानुषी लीला।२।

*श्रीगणेशाय नमः। भूतबाधा निरसुनी ब्राह्मणीते पुत्र दिला। द्वादशाध्यायी श्रीगुरूंनी मृतपुत्रहि जीवविला।।१।।* अशा रीतीने गुरुकृपा झालेल्या विषयासक्त शिष्यांनाही श्रीगुरूंच्या कृपाप्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक सिद्धी प्राप्त होतात हे मागच्या अध्यायांत सांगितले. आतां या अध्यायांत भजनाची आवड उपजविण्यासाठी त्याच सगुणरूपधारी श्रीगुरूंच्या भक्तवात्सल्याचे निरूपण करीत आहेत. नामधारक सिद्धमुनींना विचारतात. अहो सिद्धमुनी, भगवान तर कृष्णावेणीच्या तटावरील आश्रमांतून गाणगापूरला निघून गेले. तरीही तिथेच यज्ञ-दान-तप इत्यादि उपासना करणाऱ्या भक्तांना कोणत्या दैवताकडून आणि केव्हांपासून फळ मिळाले? श्रीगुरू तर तिथे नव्हते. मग त्यांच्या भक्तांची कार्ये कशी सफळ झाली?१. नामधारकाच्या या प्रश्नाचे उत्तर उदाहरणासहित देत आहेत. उदाहरण म्हणजे सार्वत्रिक नियम सिद्ध करण्यासाठी एका अंशाचे परीक्षण. जशी शितावरून भाताची परीक्षा. **गती** म्हणजे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे; **स्थिती** म्हणजे एकाच स्थळी राहणे; **आसन** म्हणजे बसून राहणे; आणि **स्वप्न** म्हणजे निजणे. हे सगळे आत्म्याचे धर्म नाहीत. चैतन्यस्वरूप श्रीगुरूंच्या ठिकाणी संभवत नाहीत.

**भाव्यतेऽजो भावनया यद्वत्तद्वद्विभात्यसौ । एवं यद्भावनात्रेदृक् तादृग्जागर्ति तत्र सः ।।३।।**
**योगिनीवरदानादि यैर्यैर्गङ्गानुजाच्छ्रुतम् । ते ते भक्त्याभजंस्तत्र तं स तत्कामदोऽभवत् ।।४।।**

यैः यैः गङ्गानुजात् योगिनी+वर+दानादि श्रुतं ते ते भक्त्या तत्र अभजन्। तं सः कामदः अभवत्।३। अजः भावनया यद्+वत् भाव्यते तद्+वत् असौ भाति। एवं अत्र ईदृक् यत् भावना तत्र तादृक् जागर्ति।४।

'हे निर्गुण परमात्म्याच्या विषयी ठीक आहे. स्वेच्छेने कां होईना सगुण रूप धारण केलेल्या श्रीगुरूंना हे सर्व धर्म असणारच की.' या शंकेचे समाधान असे केले आहे की सत्य-ज्ञान-अनंत-आनंद यांच्या एकरसाने आपल्या नित्य षड्गुण ऐश्वर्यासहित अवतरलेल्या श्रीगुरूंचा देहादि उपाधीशी संपर्कच होऊं शकत नाही. तेव्हां हे सर्व शरीरधर्म त्यांना स्पर्शूं शकत नाही. मग 'ते भामीतीरी गेले,' असे तुम्हीच म्हणाला, त्याची काय वाट? तर स्वेच्छेने मनुष्यरूप घेतलेल्या सद्गुरूंची ही जाणे-येणे इत्यादि मानवी लीला - नाटक, आहे. निर्गुण ब्रह्म स्वतः एकमेवाद्वितीय असून, चलनादिरहित आहे; तरी एका ठिकाणीच राहूनही इतर धांवणाऱ्या इंद्रियादिकांच्या पलीकडे जातेच ना? *'अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत्। तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति'* (ईशावास्य उ. ४) ब्रह्मानंदकृत ईशावास्यभाष्यरहस्यांत ब्रह्म-विष्णू-शिव या रूपांतील परब्रह्म मायेमुळे साकारते त्याला *'तदेजति'* म्हटले आहे. वस्तुतः परब्रह्म निराकार आणि निश्चलच आहे. चलनाचा आभास उपाधीमुळे आहे. *'तन्नैजति'* या पदाने प्रकृतीच्या पलीकडील निर्गुण ब्रह्माचा बोध होतो.'२. परमेश्वराविषयी ज्याचा जसा भाव तसाच त्याला तो भासतो. त्यानुसार जिथे असा 'फलदाता भगवंत साक्षात् नांदत आहे,' अशी भावना उत्पन्न होते तिथे त्या भावाला अनुसरूनच तो जागतो - इष्टफळ देण्याला सदैव उन्मुख असतो. अशा रीतीने परमार्थांत काय किंवा व्यवहारांत काय ज्याचे जसे जसे ज्ञान असेल त्याला तसेच फळ मिळते. तैत्तिरीय उपनिषदाच्या वचनानुसार (२:६:१) ब्रह्म नाही असे जो म्हणतो तो असतच होतो. ब्रह्माचे अस्तित्वाला मानणारा संत जाणला जातो.'

**शृण्वेवं सति तत्रत्या मृतापत्यत्वदुःखिता । काचिद् द्विजसती विप्रान्स्वस्त्यर्थं शरणं ययौ ।।५।।**
**प्रपन्नां प्रेक्ष्य तां दीनां निजभक्तिविधित्सया । देवप्रेरितधीः कश्चित्तद्दैवं भूसुरोऽब्रवीत् ।।६।।**
**मृतापत्यत्वदोषांस्तु शृणु साध्वि पुरार्जितान् । मृतापत्यत्वादिदोषाः प्रायशः प्रेतहेतवः ।।७।।**

शृणु।' एवं सति तत्रत्या मृत+अपत्यत्व+दुःखिता काचित् द्विजसती स्वस्त्यर्थं विप्रान् शरणं ययौ।५। तां दीनां प्रपन्नां प्रेक्ष्य निज+भक्ति+विधत्सया कश्चित् भूसुरः तत्+दैवं अब्रवीत्।६। (हे) साध्वी, शृणु। मृत+अपत्य+दोषान् तु पुरा अर्जितान्। प्रायशः मृत+अपत्य+दोषाः प्रेत+हेतवः।७।

यावर श्रीमच्छंकराचार्यांचे भाष्य असे आहे, जो ब्रह्माचे (परमात्म्याचे) अस्तित्व मानीत नाही त्याची सर्व सन्मार्गावर, वर्णाश्रमधर्मावर श्रद्धा राहत नाही. साहजिकच तो ईश्वराला विमुख होऊन नास्तिक होतो आणि लोकांत असाधू गणला जातो. त्याच्या उलट जो ब्रह्म आहे असे म्हणतो तो ब्रह्माकडे - ईश्वराकडे नेणाऱ्या वर्णाश्रमधर्मादि सन्मार्गांवर श्रद्धा ठेवून तसे आचरण करतो. साहजिकच साधुजन त्याला सन्मार्गावर चालणारा - संत असे ओळखतात.३. ज्यानी ज्यांनी गंगानुजाकडून योगिनींना श्रीगुरूंनी दिलेले वरदान इत्यादि वृत्त ऐकले त्यांनी त्यांनी त्या पादुकांची भक्तीपूर्वक उपासना केली. त्या सर्वांच्या कामना भगवंतांनी पूर्ण केल्या.४. सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, ऐक! असा क्रम तिथे चालूं असतां तेथील (नजीकच्या शिरोळ गांवातील) एक जन्मतः होणाऱ्या अर्भकांच्या मृत्यूमुळे त्रस्त असलेली एक ब्राह्मणस्त्री ब्राह्मणांना शरण गेली आणि तिने आपली मुले वाचविण्याचा उपाय विचारला.५.

**ब्रह्महा भ्रूणहा वाऽपि गोघ्नोऽश्वघ्नोऽपरार्थहृत् । ब्रह्मस्वात्स्वर्णहा पापी लभेज्जन्मान्तरे त्विदम् ।।८।।**
**लोहाश्मदारुचूर्णानि प्रयत्नाज्जरयेत्पुमान् । ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति ।।९।।**
**हृतस्वार्थाभिलाषेण चेन्मृतो ब्राह्मणः स तु । गत्वा पिशाचतां स्वार्थी सदा स्याद्धर्तृवंशहा ।।१०।।**

ब्रह्महा, भ्रूणहा वा, गोघ्नः, अश्वघ्नः अपि, अपर+अर्थ+हृत्, ब्रह्म+स्व+अत्, स्वर्ण+हा पापी तु जन्म+अंतरे इदं लभेत्।८। हृत+स्व+अर्थ+अभिलाषेण ब्राह्मणः मृतः चेत् स तु स्वार्थी पिशाचतां गत्वा सदा हर्तृ+वंश+हा स्यात्।९। लोह+अश्म+दारु+चूर्णानि पुमान् प्रयत्नात् जरयेत्। ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति?१०।

त्या काकुळतीने विनवणी करणाऱ्या ब्राह्मणीला पाहून, तिला आपल्या भक्तीकडे आकृष्ट करण्यासाठी श्रीगुरूंनीच ज्याच्या बुद्धीला प्रेरणा केली होती अशा कुणा एका ब्राह्मणाने तिला तिच्या प्राक्तनाची कल्पना दिली. ज्योतिष्यादि शास्त्राच्या आधारे नव्हे तर श्रीगुरुप्रेरित बुद्धीने!६. प्रथमतः त्याने सामान्यतः जन्मतांच मुले मरण्याला कारण असलेल्या पापांविषयी सांगितले. 'हे दोष पूर्वजन्मार्जित असतात,' असे सांगून तो म्हणाला, 'हे दोष बहुतेक पिशाचबाधेमुळे घडतात.७. ब्राह्मणाची हत्या करणारा, स्त्रियांचे गर्भ किंवा अर्भक यांची हत्या करणारा, परद्रव्याचा अपहार करणारा, ब्राह्मणाच्या द्रव्याचा बळजबरीने अथवा चोरीने उपभोग घेणारा, सोन्याची चोरी करणारा किंवा अशीच इतर पापे करणाऱ्याला पुढच्या जन्मात हे मृत अर्भकाचे दुःख भोगावे लागते.' तु शब्दाने तशीच उत्कट पापे असतील तर हितोपदेशांत (मित्रलाभ कथा ३) सांगितल्याप्रमाणे या जन्मांतही असे दुःख प्राप्त होऊं शकते. ('*अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते।*')८. सर्व पापांत ब्राह्मणाच्या द्रव्याचा अपहार मोठा असल्याचे सांगतात. लोखंड, दगड वा लाकूड यांचा चुराही कुणी प्रयत्नाने पचवूं शकतील. पण ब्राह्मणाकडून लुबाडलेले द्रव्य त्रैलोक्यांत कोण कसे पचवील? अर्थात् कुणीही पचवूं शकत नाही.९. आपल्या अपहार झालेल्या द्रव्याच्या लोभाने जर तो ब्राह्मण मृत झाला तर तो स्वार्थाभिलाषी पिशाच योनीत जातो आणि आपले द्रव्य लुबाडणाऱ्याच्या वंशच्छेद करतो.१०.

**त्वया भवान्तरे साध्वि हृतं शौनकगोत्रिणः । द्रव्यं विप्रस्य सोऽर्भांस्ते भूत्वा प्रेतो निहन्त्युत ।।११।।**
**भोगादेव क्षयः साध्वि नान्यथारब्धकर्मणः । तस्मात्प्रारब्धजफलं भुङ्क्ष्व कोऽत्र निवारकः ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा कर्णशूलाभं त्रस्तचित्ताऽब्रवीद् द्विजम् । भो ब्रह्मन्मानुगृह्णीष्व मुक्त्युपायमुपादिश ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्रेतौर्ध्वदेहिकं कर्म प्रायश्चित्तपुरःसरम् । कारयित्वाङ्ग भर्त्रा त्वं मासमात्रं व्रतं चर ।।१४।।**

(हे) साध्वि, त्वया भव+अंतरे शौनक+गोत्रिणः विप्रस्य द्रव्यं हृतम्। सः प्रेतः भूत्वा ते अर्भान् निहन्ति उत।११। (हे) साध्वि, आरब्ध+कर्मणा भोगात् एव क्षयः। न अन्यथा। तस्मात् प्रारब्धजं फलं भुङ्क्ष्व। अत्र कः निवारकः?१२। तत् कर्ण+शूलाभं श्रुत्वा त्रस्त+चित्ता द्विजं अब्रवीत्। भो ब्रह्मन्, मां अनुगृह्णीष्व, मुक्ति+उपायं उपादिश।१३। विप्र उवाच। प्रेत+और्ध्वदेहिकं प्रायश्चित्त+पुरःसरं कर्म भर्त्रा कारयित्वा त्वं मासमात्रं व्रतं चर।१४।

इथपर्यंत सामान्य शास्त्रार्थ सांगून आतां तो ब्राह्मण त्या स्त्रीचे विशिष्ट कर्म सांगत आहे. 'हे सती, तूं पूर्वजन्मी एका शौनकगोत्रीय ब्राह्मणाचे पैसे लुबाडले. तोच आतां पिशाच होऊन तुझी बाळे मारीत आहे.११. हे सती, आपण जन्माला येतांना बरोबर आणलेले कर्म - म्हणजे प्रारब्ध. ते भोगूनच संपवतां येते. दुसरा कांहीही उपाय नाही. तेव्हां तुझ्या प्रारब्धकर्माचे फळ भोग. त्याचा कोण प्रतिकार करूं शकेल? अर्थात् कुणीही नाही.'१२. ते कर्णकटु बोल ऐकून त्या ब्राह्मणीचे मन संत्रस्त झाले. ती त्या ब्राह्मणाला म्हणाली, 'अहो विप्रवर! ह्या दुःखांतून सुटण्याचा कांही उपाय आपण मला सांगावा.'१३. त्या ब्राह्मणाने तिला सांगितले, 'त्या पिशाच झालेल्या ब्राह्मणाचे शास्त्रोक्त पिंडदानादि अंत्यकर्म, नारायणबळी इत्यादी अनुष्ठानांसहित तुझ्या पतीकडून करवून घे आणि मी पुढे सांगणार असलेले व्रत एक महिनाभर कर.' पतीच्या द्वारा अंत्येष्ट्यादि कर्मे करवून घ्यायला सांगण्याचे कारण स्त्रियांना ते स्वतंत्रपणे करायला शास्त्राज्ञा नाही. 'पतिद्वारा करवून घे' ह्या सांगण्यांत स्त्रीच मुख्य कर्ता आहे असा अर्थ काढूं नये. पतीला सांगून ते करावे असा अर्थ विवक्षित आहे.१४.

**कृष्णापञ्चनदीयोगे स्नात्वा श्रीगुरुपादुकाम् । उदुम्बरं चाष्टतीर्थस्नानपूर्वं समर्चय ।।१५।।**
**ब्राह्मणान्भोजयित्वाथ शतद्रव्यं द्विजातये । देहि शौनकगोत्राय शुद्धिस्तेनैव ते सति ।।१६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**शतद्रव्यं कुतो लभ्यं मासमात्रं करोम्यहम् । सद्गुरोरर्चनं भक्त्या स मां पायाद्भयाद्धरिः ।।१७।।**
**इति निश्चित्य सा पत्या यथानिर्दिष्टमाचरत् । दिनत्रयान्तरे स्वप्ने तस्या विप्रपिशाचकः ।।१८।।**

कृष्णा+पंचनदी+योगे स्नात्वा, अष्ट+तीर्थ+स्नानपूर्वं श्रीगुरु+पादुकां उदुम्बरं च समर्चय।१५। अथ ब्राह्मणान् भोजयित्वा शौनक+द्विजातये शतद्रव्यं देहि। (हे) सति, तेन एव ते शुद्धिः (भविष्यति)।१६। ब्राह्मणी उवाच। शतद्रव्यं कुतो लभ्यम्? अहं मासमात्रं भक्त्या सद्गुरोः अर्चनं करोमि। सः हरिः मां भयात् पायात्।१७। इति निश्चित्य सा पत्या यथा+निर्दिष्टं आचरत्। दिन+त्रय+अंतरे तस्या स्वप्ने विप्र+पिशाचकः।१८।

प्रथम कृष्णा आणि पंचगंगा यांच्या संगमांत न्हाऊन मग अष्टतीर्थांत स्नाने करावीत आणि श्रीगुरूंच्या पादुकांची तसेच औदुंबर वृक्षाची विधिपूर्वक पूजा करावी.१५. 'एक महिनाभर असे व्रत आचरून यथाशक्ती ब्राह्मणांना भोजन घालून त्या प्रेतासाठी म्हणून शौनक गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला शंभर रौप्य मुद्रांचे दान कर. हे साध्वी, ह्यानेच तुझ्या पापाची निष्कृति होईल.'१६. ती ब्राह्मणी म्हणाली, 'शंभर रौप्यमुद्रा मी कुठून आणूं? मात्र एक महिनाभर मनोभावे मी सदगुरूंची पूजा करीन. तो हरीच माझे या पिशाचाच्या भयापासून रक्षण करो.'१७. असा मनाचा निश्चय करून त्या ब्राह्मणीने आपल्या पतीसह ब्राह्मणाने सांगितल्याप्रमाणे सर्व अनुष्ठान सुरूं केले. तीन दिवसांनी तिच्या स्वप्नांत येऊन एक ब्रह्मसमंध तिला भीती दाखवून(१८) आपले पूर्वजन्मींचे लुबाडलेले धन मागूं लागला. त्या भयभीत सतीली औदुंबराच्या मुळापाशी दुःख हरण करणाऱ्या श्रीगुरूंचे दर्शन झाले.१९.

**ब्राह्मणीं भीषयित्वा तां ययाचे द्रव्यमात्मनः । भीतोदुम्बरमूले सा ददर्श श्रीगुरुं हरिम् ।।१९।।**
**तां च तं तादृशं दृष्ट्वा पिशाचं प्राह सद्गुरुः । कस्त्वं पिशाचरूपेण सतीं खेदयसेऽधम ।।२०।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**यतीन्द्र त्वय्यनर्होऽयं पक्षपातोऽहमात्मनः । अनयाऽपहृतं द्रव्यं याचितुं हीदृशोऽभवम् ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**अनेन ते कथं मोक्षो बह्वमङ्गलयोनितः । येनाप्यते सद्गतिस्तच्छृणु तेन हितं भवेत् ।।२२।।**

ब्राह्मणीं भीषयित्वा तां आत्मनः द्रव्यं ययाचे। भीता सा उदुम्बर+मूले श्रीगुरुं हरिं ददर्श।१९। तां तादृशं, तं च दृष्ट्वा सद्गुरुः पिशाचं प्राह। (रे) अधम! सतीं पिशाचरूपेण खेदयसि, त्वं कः?२०। पिशाच उवाच। (हे) यतीन्द्र! अयं पक्षपातः त्वयि अनर्हः। अनया अपहृतं आत्मनः द्रव्यं याचितुं अहं ईदृशं अभवम् हि।२१। श्रीगुरुः उवाच। अनेन ते बहु+अमंगल+योनितः कथं मोक्षो? येन सद्गतिः आप्यते तत् शृणु। तेन हितं भवेत्।२२।

त्या भयाकूल ब्राह्मणीला आणि तिला भिवविणाऱ्या त्या पिशाचाला पाहून त्याला सद्गुरूंनी विचारले, 'अरे नीचा! त्या बिचाऱ्या सतीला कष्ट देणारा तूं कोण आहेस?'२०. तो समंध उत्तरला, 'अहो यतिराज, आपल्यासारख्या संन्याशाला हा पक्षपात शोभत नाही. ह्या स्त्रीने लुबाडलेले माझे धन मागतां मागतां मला ही अशी अमंगळ अवस्था प्राप्त झाली.' धनाच्या वासनेने आपल्याला या योनीत खेचून आणले असल्याने आपला कांही दोष नाही असा त्या पिशाचाचा दावा आहे.२१. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अशा भयंकर अपत्यहत्येने तिचा छळ करून तुझी ह्या अत्यंत अमंगळ कष्टप्रद योनीतून कशी सुटका होईल? तुला सद्गती लाभेल असा उपाय ऐक. त्याने तुझे कल्याण होईल. ह्या दुःखद योनीतून तुझी मुक्ती होईल.२२.

**योन्यन्तरे हृतार्थोऽस्ति किंत्वत्र फलभागिनी । प्राप्ता दरिद्रवंशेऽसौ लभ्यतेऽतः कुतो धनम् ।।२३।।**
**अतस्तया कारयित्वा शक्त्या कर्मौर्ध्वदेहिकम् । त्वद्गोत्राय यथालभ्यं दापयित्वा धनं खलु ।।२४।।**
**विप्राय प्रेत कस्मैचित्ततो मोक्षं ददामि ते । नेदं त्वां रोचते चेत्तां रक्षामि स्वेच्छयाचर ।।२५।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**देवदेव कृतार्थोऽस्मि त्वत्पादाब्जविलोचनात् । ममाद्य निष्कृतिर्जाता यथेच्छसि तथा कुरु ।।२६।।**
**एवं तन्निश्चयं ज्ञात्वा ब्राह्मणीं प्राह सद्गुरुः । संवादो नौ श्रुतः साध्वि तथा निर्व्याजमाचर ।।२७।।**

हृतः अर्थः योनि+अन्तरे अस्ति। किंतु असौ अत्र फलभागिनी दरिद्रवंशे प्राप्ता। अतः धनं कुतो लभ्येत्?२३। (हे) प्रेत, अतः तया शक्त्या और्ध्वदेहिकं कर्म कारयित्वा त्वत्+गोत्राय कस्मैचित् विप्राय यथालभ्यं धनं दापयित्वा ते मोक्षं ददामि खलु। इदं त्वां न रोचते चेत् तां (अहं) रक्षामि। (त्वं) स्वेच्छया आचर।२५। पिशाच उवाच। '(हे) देवदेव! त्वत्+पाद+अब्ज+विलोचनात् (अहं) कृतार्थः अस्मि। अद्य मम निष्कृतिः जाता। यथा इच्छसि तथा कुरु।'२६। एवं तत्+निश्चयं ज्ञात्वा सद्गुरुः ब्राह्मणीं प्राह। (हे) साध्वि, नौ संवादः (त्वया) श्रुतः। तथा निर्व्याजं आचर।२७।

तिने तुझ्याकडून पूर्वजन्मी हिरावलेल्या शंभर रौप्यमुद्रा तर त्याच जन्मांत राहिल्या. आतां ह्या जन्मांत त्या अपहाराच्या पापाचे फळ ही भोगत असल्याने बिचारी दरिद्री कुळांत जन्मली आहे. मग तिला कुठून एवढे पैसे मिळणार?२३. अरे समंधा, एवढ्यासाठी ह्या ब्राह्मणीकडून यथाशक्ती तुझे अंत्यसंस्कार करवून आणि तुझ्या गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला तिला शक्य असेल तेवढे पैसे देववून मी तुला या योनीतून नक्की मुक्त करीन.२४. तुला हे पटत नसेल तर तुला वाटेल ते तूं कर! मी ह्या सतीचे रक्षण करीन.२५. तो समंध म्हणाला, 'देवाधिदेवा दत्तात्रेया! आपल्या चरणकमलांच्या दर्शनाने मी कृतकृत्य झालो आहे. माझ्या पापकर्माची निष्कृती झाली आहे. आपण आपल्या इच्छेनुसार काय ते करावे.'२६. असा त्या पिशाचाचा निश्चय जाणून त्या ब्राह्मणस्त्रीला सद्गुरू म्हणाले, 'हे सती, तूं आमचा संवाद ऐकलास. त्याप्रमाणे ह्या ब्राह्मणाचे क्रियाकर्म निष्कपटपणे कर.'२७.

**तेनासौ सद्गतिं यायाद्वंशवृद्धिश्च ते भवेत् । उक्त्वैवं ध्यानगम्योऽभूद्धरिर्बुद्धाऽभवत्सती ।।२८।।**
**पत्ये शशंस तत्सर्वं तथैवाचीकरत्क्रियाम् । तया प्रेतो गतिं लेभे साप्यपापा बभूव ह ।।२९।।**
**अपरेऽहनि तत्स्वप्ने फले विन्यस्य चांशुके । तामाह भोजयित्वाऽजो विप्रान्भुङ्क्ष्व फलेत्विति ।।३०।।**
**प्रबुद्धापि फले दृष्ट्वा भोजयित्वा द्विजान् फले । कान्तेन साकं बुभुजे ततोऽभूद्गर्भिणी सती ।।३१।।**

तेन असौ सद्गतिं यायात्। ते वंश+वृद्धिः च भवेत्। एवं उक्त्वा हरिः ध्यान+गम्यः अभूत्। सती बुद्धा अभवत्।२८। तत् सर्वं पत्ये शशंस। तथा एव क्रियां आचीकरत्। तया प्रेतः गतिं लेभे। सा अपि अपापा बभूव ह।२९। अपरे अह्नि तत्+स्वप्ने अंशुके फले विन्यस्य च अजः तां आह, विप्रान् भोजयित्वा फले भुङ्क्ष्व।३०। (सा) प्रबुद्धा अपि फले दृष्ट्वा, द्विजान् भोजयित्वा कान्तेन साकं फले बुभुजे। ततः सती गर्भिणी अभूत्।३१।

त्या तूं केलेल्या क्रियाकर्मानि ह्या पिशाचाला सद्गती लाभेल आणि त्याची पीडा जाऊन तुझा वंशही वाढेल.' असे बोलून भगवान् ध्यानगम्य - म्हणजे अदृश्य झाले आणि ती सती जागी झाली.२८. ते सर्व स्वप्न त्या स्त्रीने आपल्या पतीले निवेदन केले. त्याप्रमाणेच त्यांनी सर्व कर्म केले. त्यायोगे त्या पिशाचाचे प्रेतत्व परिहरून तो उत्तम लोकांला गेला. ती सतीही पापरहित झाली. वरील आख्यानाद्वारा कठोपनिषदांत (१:१:२०) नचिकेताने यमाला विचारलेल्या प्रश्नांत 'मृत्यूनंतर जीव असतो असे कुणी म्हणतात तर नसतो असे कांही म्हणतात' या दोन मतांतील, मृत्यूनंतर जीवाला अस्तित्व नसते असे मत खोडून काढले आहे. कठोपनिषदांतच पुढे (२:२:७) जीव आपापल्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार स्थावर किंवा जंगम योनीत जातात असे प्रतिपादन केले आहे.२९. दुसऱ्या दिवशी तिच्या पदरांत दोन नारळ घालून श्रीगुरूंनी तिला सांगितले की 'ब्राह्मणभोजन घालून ही फळे तुम्ही दोघे खा.'३०. जागी झाल्यावरही आपल्या पदरांत फळे पाहून तिने श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ब्राह्मणांना जेवायला घालून ती फळे आपल्या पतीसह भक्षण केली. त्या फळप्रसादाच्या प्रभावाने ती ब्राह्मणी गर्भवती झाली.३१.

**काले दत्तप्रसादेन सूर्याचन्द्रमसाविव । पुत्रावसूत विप्रोऽपि जातकर्मादिकं व्यधात् ।।३२।।**
**ततोऽष्टमेऽब्दे ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा । सम्भाराः संभृताः पित्रा तदाद्भुतमिवाभवत् ।।३३।।**
**अकस्मात्सन्निपातेन ज्येष्ठपुत्रो ममार हि । उच्चै रुरोद तन्माता कोरस्ताडनपूर्वकम् ।।३४।।**

दत्तप्रसादेन काले (सा सती) सूर्या+चंद्रमसौ इव पुत्रौ असूत। विप्रः अपि जात+कर्मादिकं व्यधात्।३२। ततः ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा पित्रा सम्भाराः सम्भृताः। तदा अद्भुतं इव अभवत्।३३। ज्येष्ठपुत्रः अकस्मात् सन्निपातेन ममार हि। तन्+माता उच्चैः क+उरस्+ताडन+पूर्वकं रुरोद।३४।

श्रीदत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने त्या सतीला सूर्य-चंद्रसदृश जुळे मुलगे झाले. तिच्या पतीने शास्त्राप्रमाणे जन्माच्या संबंधीची कर्मे केली.३२. पुढे ज्येष्ठ (जुळ्यांतील नंतर जन्मलेल्या) पुत्राच्या मौंजीबंधनासाठी वडिलांनी सर्व सामुग्री जमवून तयारी केली असतां त्या वेळी एक नवलच घडले.३३. तो थोरला भाऊ अचानक सन्निपाताने मरण पावला. सन्निपात म्हणजे तीनही दोषांचा एकदम प्रकोप होणे. त्यामुळे अभिन्यास नांवाचा अत्यंत गंभीर असा ज्वर होतो. श्रीस्वामि महाराजांनी इथे माधवनिदानांतील ज्वरनिदानांतील श्लोक उद्धृत केले आहेत. शरीराचे तापमान खूप वाढून, सर्व ज्ञानेंद्रियांची (घ्राण, नेत्र, कान इत्यादि) शक्ती क्षीण होते. रोगी एकाच जागेवर निश्चल पडून राहतो. उशीवर डोके बडवून घेतो. सारखा कुशी बदलतो. कधी तरी थोडेसेच बोलतो. इत्यादि लक्षणे सांगितली आहेत. चरकसंहितेत याला अभिषंगज्वर असे म्हटले आहे. तो काम, शोक, भय, क्रोधांनी अभिभूत झालेल्या व्यक्तीला होतो. भूत-पिशाचांच्या अभिषंगानेही तो होतो असे तिथे म्हटले आहे. अशा भयानक विकाराने ग्रस्त झालेला त्या मुलाची वाणी छांदोग्योपनिषदांत (६:८:६) सांगितलेल्या क्रमाने मनांत विलीन झाली, मन प्राणांत, प्राण तेजांत, तेज परदेवतेत विलीन झाले. अंती तो बिचारा मुलगा हात-पाय वेडेवाकडे करीत, मर्मस्थानांच्या नाशाने प्राणांचे उत्क्रमण होऊन सर्व इंद्रियांच्या लयाद्वारे मरण पावला. त्याची माता मस्तक आणि ऊर पिटीत जोरजोराने रडूं लागली.३४.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**हा पुत्र क्व गतोसि त्वं पयो मे स्रवते वृथा । कति शेषेऽचिरं वत्स बुद्ध्यस्वेदं पयः पिब ॥३५॥**

**भोजनावसरोऽयं ते भुक्त्वा रन्तुं चराङ्गणे । वयस्या आह्वयन्ति त्वामुत्तिष्ठोत्तिष्ठ मा स्वप ॥३६॥**

**त्वं नोत्तिष्ठसि चेत्प्राणांस्त्यक्ष्याम्यग्रे तवाधुना । जाता ये पञ्चपुत्रा मे तेषां त्वं प्राणवन्मम ॥३७॥**

ब्राह्मणी उवाच। 'हा पुत्र! क्व गतः असि? मय पयः वृथा स्रवते। कति शेषे? (हे) वत्स! अचिरं बुद्ध्यस्व। पयः पिब।'३५। 'अयं ते भोजन+अवसरः। वयस्याः त्वां रन्तुं आह्वयन्ति। भुक्त्वा अङ्गणे चर। उत्तिष्ठ, उत्तिष्ठ, मा स्वप।३६। अधुना त्वं न उत्तिष्ठसि चेत् तव अग्रे प्राणान् त्यक्ष्यामि। ये मे पंच पुत्रा जाता तेषां त्वं मम प्राणवत्।३७।

ती माता रडतां रडतां पुत्राला उद्देशून बोलूं लागली. 'अरे बाळा, कुठे रे गेलास तू? हे पाहा माझे दूध व्यर्थ वाहून जाते आहे. किती झोपतोस? माझ्या राजा, राजा रे, राजुड्या, लवकर ऊठ, हे वायां जाणारे दूध पी!' 'अरे तुझी जेवायची वेळ झाली आहे. हे तुझे सवंगडी बघ तुला खेळायला बोलावीत आहेत. जेवून त्यांच्याबरोबर अंगणांत खेळायला जा. ऊठ! ऊठ! असा झोपू नकोस!३६. आता जर तू उठला नाहीस तर मी तुझ्यापुढेच जीव देईन. मला जे पाच पुत्र झाले त्यांत तूं माझा जीव की प्राण आहेस.३७. तूं मेलास तर मीही मरून जाईन, कारण तूच माझा प्राण आहेस! बाळा, अगदी गर्भधारणेपासून आजपर्यंत मला तू कांहीसुद्धा त्रास दिला नाहीस. ३८.

**मृते त्वयि मरिष्ये मे यतः प्राणोऽसि केवलम् । रे दोहदप्रभृत्यद्य यावद्दुःखं न दापितम् ।।३८।।**
**गर्भे नष्टास्त्रयोऽर्भास्तद्दुःखं त्वन्मुखवीक्षणात । मया विस्मृतमद्याक-सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि ।।३९।।**
**धर्मोऽयं ते न वार्धक्ये त्राता नौ पुत्र को वद । एवं तद्रुदितं श्रुत्वा तत्रत्या ऊचुरेत्य ताम् ।।४०।।**
**किं शोचसि वृथा भीरु मृत्युर्देवर्षिदानवान् । न विस्मरति कालेऽपि मनुष्याणां तु का कथा ।।४१।।**
**अवतारा येऽवतीर्णास्तेऽपि कालवशं गताः । एवं सति वृथा शोकं त्वं मा कुरु विचारय ।।४२।।**

त्वयि मृते मरिष्ये, यतः केवलं प्राणः असि। रे! दोहद+प्रभृति अद्य यावत् दुःखं न दापितम्।३८। त्रयः अर्भाः गर्भे नष्टाः तत् दुःखं त्वन्+मुख+वीक्षणात् मया विस्मृतम्। अद्य अक+सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि?'३९। अयं ते न धर्मः। (हे) पुत्र! वार्धक्ये नौ कः त्राता वद। एवं तत्+रुदितं श्रुत्वा तत्रत्या एत्य तां ऊचुः।४०। '(हे) भीरु, वृथा किं शोचसि? मृत्युः काले देव+ऋषि+दानवान् न विस्मरति। मनुष्याणां तु का कथा?४१। ये अवताराः अवतीर्णाः ते अपि कालवशं गताः। एवं वृथा शोकं मा कुरु। विचारय।'४२।

माझी तीन बाळे गर्भांतच नाश पावली. ते दुःख मी तुझ्याकडे पाहून विसरले. आतां मला दुःखाच्या सागरांत बुडवून कुठे निघालास?३९. आमचा असा त्याग करणे हा तुझा धर्म नाही. आम्हां मायबापांना म्हातारपणी कोण दुसरा सांभाळणारा आहे, सांग बरे! इहलोकांत किंवा परलोकांत पुत्राशिवाय कुणीच त्राता नाही याविषयी श्रीस्वामिमहाराजांनी ऐतरेय ब्राह्मणांतील मंत्राचा (पराकाशांत पुत्रच ज्योतिःस्वरूप आहे. पितर पुत्रामुळेच गाढ अंधःकाराला ओलांडून जातात..' ७:३:१) दाखला दिला आहे.४०. 'भयशीले (स्त्रिये), व्यर्थ कां शोक करतेस? काळ आला की मृत्यू देव, ऋषी वा दैत्य यांनासुद्धां विसकरत नाही (सोडत नाही), मग मनुष्यांची ती काय गोष्ट?४१. रामकृष्णादिक अवतारांचाही यथाकाल नाश झालाच ना? असा व्यर्थ शोक न करता तू नश्वर देह आणि चिरंतन आत्मा यांचा विचार कर.'४२.

**।। सोवाच ।।**

**अहो बत पिशाचोत्थं दूरीकृत्य भयं हि मे । येन देवेन यद्दत्तं फलं तद्विफलं कथम् ।।४३।।**
**यदि तस्य मृषा वाक्यं तं भजन्ति कुतोऽपरे । बिभीषणध्रुवमुखैर्मन्तव्यं तदृतं कथम् ।।४४।।**
**लोकान्तरे नयाम्येतां तत्कीर्तिं सूनुना सह । एवं रुदित्वा संस्कर्तुं न ददौ शवमङ्गना ।।४५।।**
**ग्रामे तु भोजनाभावाल्लोकास्त्रस्तास्तदैत्य हि । यदृच्छयाऽब्रवीद्वाग्मी जटिलस्तापसः सतीम् ।।४६।।**

सा उवाच। 'अहो बत पिशाच+उत्थं भयं दूरीकृत्य येन देवेन यत् फलं दत्तं तत् कथं विफलं (जातम्)?४३। यदि तस्य वाक्यं मृषा तं अपरे कुतो भजन्ति? बिभीषण+ध्रुव+मुखैः तत् कथं ऋतं मन्तव्यम्?४४। एतां तत्+कीर्तिं सूनुना सह लोकान्तरे नयामि।' अवं रुदित्वा अङ्गना शवं संस्कर्तुं न ददौ।४५। ग्रामे तु भोजनाभावात् लोकाः त्रस्ताः। तदा हि जटिलः तापसः वाग्मी यदृच्छया एत्य सतीं अब्रवीत्।४६।

ती माता म्हणाली, 'अहो काय सांगूं, पिशाचबाधेचा परिहार करून ज्या देवाने हे फळ दिले ते कसे नाश पावले?४३. जर त्या भगवंताचेच वचन मिथ्या झाले तर इतर लोक कसे त्याला भजतील? बिभीषण, ध्रुव इत्यादि भक्तांनी तरी ते कसे खरे मानावे?४४. ही त्याची कीर्ती ह्या माझ्या बाळासह स्वर्गादि लोकांत घेऊन जाते.' अशा प्रकारे विलाप करीत ती स्त्री आपल्या पुत्राचे शव अंत्यसंस्कारांसाठी देईना.४५. प्रेतसंस्काराशिवाय गांवात कुणालाही जेवतां आले नाही आणि सगळे लोक त्रासून गेले. त्या वेळी एक वाक्पटु जटाधरी तापसी अचानक तिथे आला आणि त्या सतीला उद्देशून बोलूं लागला.४६.

## ।। तापस उवाच ।।

**किं शोचसि मुधा साध्वि शोकस्याविषयं सुतम् । सुतस्तवैष देहो वा जीवो वा ब्रूहि सारतः ।।४७।।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयो देहोऽयं पुरतस्तव । जीवोऽजः सर्वगोऽनन्तः कोत्र शुग्विषयो वद ।।४८।।**

तापस उवाच। '(हे) साध्वि), किं मुधा शोचसि? सुतं शोकस्य अविषयम्। तव सुतः देहो वा जीवो वा सारतः ब्रूहि।४७। अयं त्वग्+रक्त+मांस+अस्थिमयः देहः तव पुरतः। जीवः अजः सर्वगः अनन्तः। अत्र कः शुग्+विषयः? वद!४८।

तो तापसी म्हणाला, 'हे सती, का उगीच विलाप करते आहेस? हा मुलगा शोकाचे कारण होऊच शकत नाही. मला सांग, तुझा मुलगा हा तुझ्यासमोरचा देह आहे कां त्याला सोडून गेलेला जीव आहे? अगदी विचार करून बघ!४७. हा त्वचा, रक्त, मांस, अस्थी यांचा अन्नमय, प्राणमय आदि सहा कोशांचा बनलेला देह तुझ्यापुढेच आहे. तो तुझ्याजवळच असल्याने त्याचा शोक करण्याचे कांहीच कारण नाही. सहा कोशांच्या पुरचुंडीहून वेगळा असा जीव ज्याच्यामुळे ही जड (अचेतन) पुरचुंडी सचेतनासारखी भासते तो तुझा मुलगा असे म्हणशील तो परमेश्वराचा अंश आहे, जन्ममरणादि विकारशून्य आहे. सर्वव्यापी आहे. तो आत्मा असल्याने ब्रह्मरूपच आहे. आत्म्याच्या दोन अवस्था आहेत. १. व्यवहारविशिष्ट २. केवल. व्यवहारही स्वप्न, जागृती आणि सुषुप्ती असा तीन प्रकारांचा आहे, कैवल्योपनिषदानुसार (१:१३).

१. **सुषुप्ती**त (गाढ निद्रा) तमोगुणाच्या प्रभावाने सर्व उपाधींचा विलय होऊन परमानंदरूप ब्रह्मच होतो. (*'आप्नोति इति आत्मा.'*)

**कालकर्मगुणोत्पन्नं जगन्मायामयं त्विदम् । कथं ध्रुवं हि मन्तव्यं यथा कर्मैन्द्रजालिकम् ।।४९।।**
**कालकर्मगुणाद्युत्थ-देहिनः स्वत्वकल्पना । पुत्रादिरूपा मिथ्यैषा नद्यां काष्ठौघवच्चला ।।५०।।**

इदं मायामयं जगत् तु काल+कर्म+गुण+उत्पन्नं यथा ऐन्द्रजालिकं कर्म, कथं हि ध्रुवं मन्तव्यम्?४९। एषा काल+कर्म+गुण+आदि+उत्थ+देहिनः पुत्र+आदि+रूपा स्वत्व+कल्पना मिथ्या, नद्यां काष्ठ+ओघवत् चला।'५०।

२. वाचा, हात, पाय इत्यादि इंद्रियांचा उपशम झाल्यावर येणाऱ्या **स्वप्न** या अवस्थेत तीत गिरी, नदी, समुद्र, मनुष्य, पशु इत्यादि सर्व लौकिक पदार्थांचा वासनारूप अंश घेऊन, जागृतावस्थेतील अभिमानाचा स्वतःच नाश करून, एक जगतच आपल्या अंतःकरणाने निर्माण करून, आपल्या चैतन्याने त्या कल्पित पदार्थांना रूप देऊन, जागृत अवस्थेतील वासना त्यांत आणणारा तो आत्मा (*'आदत्ते इति आत्मा'*). बृहदारण्यक उपनिषदांत (४:३:९) याचे असे वर्णन केले आहे. स्वप्नावस्थेत जीवात्मा ह्या भौतिक जगांतल्याच सर्व पदार्थांचे अंश घेऊन, आपणच त्या सर्व विस्कटून स्वतःच पुन्हां उभ्या करतो; आणि स्वतःच्याच तेजाने स्वतःच्याच प्रकाशांत स्वप्न पाहतो.

३. **जागृत** अवस्थेत नेत्रादि इंद्रियांच्या माध्यमांतून बाह्य विषयांचा भोग घेतो (*'अत्ति इति आत्मा'*) ही उपाधिविशिष्ट आत्म्याची तिसरी अवस्था आहे. कैवल्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणे तो स्त्री, अन्न, पान इत्यादि विचित्र भोगांनी परितृप्त होतो.'

उपाधिरहित **केवल आत्मा** सतत जाणारा तो आत्मा (*'अतति इति आत्मा'*). हाच ऐतरेय आरण्यांत *'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म'* असा वर्णिलेला आहे. अनंत म्हणजेच देश-काल-वस्तू ह्या परिच्छेदांनी रहित. जीव आणि अनंत ह्या दोन्हींचे एकत्व दर्शवून अजन्मा, सर्वगामी या आधीच्या विशेषणांची पुष्टीच होते. अशा रीतीने देह आणि जीव यांच्यात शोक कुणाचा करतेस ते सांग या प्रश्नांतच नकारार्थी उत्तर अभिप्रेत आहे.४८. श्रीगुरू पुढे सांगत आहेत. हे दृश्य जग त्रिगुणात्मक मायेपासून झालेले आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांना क्षोभवणारा काल आहे. आणि जीवांच्या उत्पत्तीला कारण त्यांचे कर्म असते. असे हे गारुड्याच्या इंद्रजालासारखे जग शाश्वत कसे मानतां येईल?४९. काल, कर्म, गुण यांच्यापासून उद्भवलेल्या ह्या जीवाविषयी जी 'हा माझा मुलगा' अशी आत्मीयता तुला वाटते ती मिथ्या आहे. फसवी आहे. नदीत वाहणाऱ्या लाकडांच्या समूहासारखी अस्थिर आहे.५०.

**त्वया ध्रुवा मतेयं चेद्वद पूर्वापरोद्भवे । कस्य त्वं जननी स्त्रीर्वा के वा सम्बन्धिनस्तव ।।५१।।**
**जन्ममृत्यू कालवशादलङ्घ्यौ दिनरात्रिवत् । शरीरिणोऽङ्गे बाल्यादि यथा देहान्तरं तथा ।।५२।।**
**गुरुप्रसादाद्यततो भ्रमोऽयं लीयतेऽचिरात् । तेनर्ते मृत्यवे कल्प्यो जातो वै जनुषे मृतः ।।५३।।**

इयं त्वया ध्रुवा मता चेत् वद पूर्व+अपर+उद्भवे त्वं कस्य जननी? स्त्रीः वा? के वा ते सम्बन्धिनः?५१। जन्म+मृत्यू कालवशात् दिन+रात्रिवत् अलंघ्यौ। शरीरिणः अङ्गे यथा बाल्यादि तथा देहांतम्।५२। गुरुप्रसादात् यततः अयं भ्रमः अचिरात् लीयते। तेन ऋते जातः वै मृत्यवे कल्प्यः मृतः जनुषे।५३।

तरीही तुला वाटणारी आपुलकी खरी आणि कायमची मानलीस तर मग सांग बरं तू पूर्वीच्या किंवा पुढच्या जन्मी कुणाची आई वा स्त्री होतीस आणि होणार आहेस? कोण कोण तुझे नात्यांतले होते आणि होतील?५१. 'जीवासाठी मी शोक करीत नाही, त्याच्या जन्म-मृत्यूमुळे होणाऱ्या दुःखाने शोक होतो' असे तू म्हणशील तर जसा दिवस संपला की रात्र येते आणि रात्रीनंतर पुन्हा दिवस, तसेच जन्म आणि मृत्यू कालाधीन आहेत. ते टाळतां येत नाहीत. देहाभिमानी जीवाला त्याच्या शरीराच्या बाल्यादि अवस्था नेमलेल्याच असतात (*'देहिनेऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यते।।'* भ.गीता २:१३). 'जो अल्पवयस्क आणि अशक्त असा बालक मी होतो तोच मी प्रौढ आणि बलवान झालो आहे', ही जशी जाणीव असतेच; किंवा नवजात बालकाची पूर्वजन्मीची सर्व स्मृती नष्ट झालेली असूनही स्तन चोखण्याची प्रवृत्ती मात्र असते. तरीही जीवाविषयीची आपुलकी हा अविवेकी लोकांना वाटणारा भ्रमच आहे.५२. सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने जो प्रयत्नशील राहतो त्याचा भ्रम मात्र लवकरच विरून जातो. यततः म्हणजे शेवटच्या श्वासापर्यंत यत्नशील. ब्रह्मसूत्रांतील प्रतिपादनानुसार (४:१:१२) उपासना मृत्यूच्या क्षणापर्यंत चालूं राहिली पाहिजे. मात्र गुरुकृपेशिवाय जन्मला आलेला मृत्यू पावणार आणि मेलेला पुन्हां जन्माला येणार हे अटळ आहे (*'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च। तस्मादपरिहार्येर्थे न त्वं शोचितुमर्हसि।।'* भ.गीता २:२७). 'ह्या जन्मी नाही भ्रम गेला तर नसूं दे; पुढच्या जन्मी जाईल! पुढचा जन्म येणारच आहे की.'

**नार्यतोऽपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि । मृतः शुचा पुनर्नैति नाप्युपायान्तरायुतैः ।।५४।।**

**।। सोवाच ।।**

**न वेदान्तार्थतत्त्वादि रोचते येन मेऽर्पितम् । सुफलं तत्कुतो यातं विश्वस्तव्यः स कैर्भुवि ।।५५।।**

अतो (हे) नारि, त्वं अपरिहार्येर्थे शोचितुं न अर्हसि। मृतः शुचा, उपाय+अंतर+अयुतैः वा पुनः न एति। ५४। सा उवाच। वेदान्त+तत्त्व+अर्थ (मे) न रोचते। येन मे सुफलं अर्पितं तत् कुतः यातम्? सः भुवि कैः विश्वस्तव्यः?५५।

असे कुणी म्हणेल तर ते खरे नाही. आपण केलेल्या कर्माच्या प्रचंड पसाऱ्यांत भोग्य कर्मे किती तरी असतात. त्यांचा भोग भोगण्यासाठी कोट्यवधी अधोयोनि आणि देवादिक ऊर्ध्वयोनीत जीव फिरत असतो. त्या असंख्य फेऱ्यांत क्वचितच मनुष्यदेह लाभतो. असा मनुष्यदेह लाभला तरी त्यांत सगळी इंद्रिये पटु असणे हे विपुल पुण्याची जोड असेल तरच शक्य आहे. गरुडपुराणानुसार (धर्मकांड-प्रेतकल्प १:५) सर्व इंद्रियांनी संपन्न असा देह बहु पुण्यानेच लाभतो. पंगु, अंध इत्यादि देहांत किंवा कोळी, भिल्ल, यवन, म्लेच्छ, इत्यादि वंशांत जन्म आला तर परमार्थाचा गंधही लाभणार नाही. अगदी अधिकारी ब्राह्मण देहही मिळाला तरी मातेच्या कुशीत मल-मूत्र-वात-पित्त-कफादींनी बरबटलेल्या, रेत आणि रक्ताच्या संयोगाने झालेल्या, अशुचि बीजापासून वाढलेल्या, वारेत गुंडाळलेल्या गर्भाची वाढ आईच्या खाण्यापिण्यांत आलेल्या रसांनीच होते. त्याची शक्ती, बल, प्रज्ञा, तेज, हालचाल सर्व कुंठित असतात. मुहूर्तमात्र सहन करायला अशक्य अशा ह्या अवस्थेत दहा महिने अगतिक अवस्थेत पडून राहून योनीद्वारा कष्टप्रद रीतने बाहेर पडायचे. म्हणून पुत्राच्या मृत्यूचा शोक टाकून ज्ञानासाठी यत्नशील असावे हा भावार्थ.५३. म्हणून बाई ग, तूं ह्या पुत्रमृत्यूसारख्या अटळ गोष्टीचा शोक करणे उचित नाही. मेलेला शोकाने, विलापाने किंवा इतर हजारो उपायांनीही परत येत नाही.५४. ब्राह्मणी म्हणाली, हा सगळा वेदांत आणि तत्त्वज्ञान माझ्या गळी उतरत नाही. ज्या दत्तगुरूंनी मला हे सुफल दिलं ते असं कसं गेलं? आतां त्यांच्यावर कोण विश्वास ठेवील?५५.

॥ साधुरुवाच ॥

**यत्र त्वया वरो लब्धस्तत्र गत्वा सविस्तरम् । वरदं परिपृच्छेदं यास्येऽलं विस्तरेण भोः ॥५६॥**
**तच्छ्रुत्वा शवमादाय सद्गुरोराश्रमं ययौ । तत्र पादुकयोः शीर्षं ताडयामास भामिनी ॥५७॥**

साधुः उवाच। भोः, यत्र त्वया वरः लब्धः तत्र गत्वा वरदं इदं सविस्तरं परिपृच्छ्। विस्तरेण अलम्।५६। तत् श्रुत्वा शवं आदाय सद्गुरोः आश्रमं ययौ। तत्र भामिनी पादुकयोः शीर्षं ताडयामास।५७।

तेव्हां तो साधू म्हणाला, जिथे तुला पुत्रप्राप्तीचा वर मिळाला तिथे जाऊन वर देणाऱ्या हरीलाच तूं हे सर्व विचार. मी आतां अधिक कांही न बोलतां जातो.५६. ते त्या साधूचे बोलणे ऐकून ती सती आपल्या पुत्राचे ते शव घेऊन सद्गुरूंच्या मंदिराला गेली. शोक आणि संतापाने तापलेल्या त्या स्त्रीने तिथे पादुकांवर डोके आपटून घेतले.५७. अशा प्रकारे तिने संध्याकाळपासून रात्रीपर्यंत शोक केला आणि अंत्यसंस्कारासाठी ते प्रेत दिले नाही. त्यामुळे वाट पाहून ब्राह्मण घरी गेले. ते दोघे पती-पत्नी मात्र तिथेच राहिले.५८.

**प्राण -** थोड्या वेळाने रात्री तिला झोप लागली. स्वप्नांत तिला श्रीगुरूंचे दर्शन झाले. ते तिला म्हणाले, 'बाई, मी काय तुझे काय अहित केले आहे?' 'तो' (**सः**) असा वेदांनी अपरोक्षत्वाने निर्देशिलेला वायू म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदानुसार (३;७:२) सर्वज्ञत्वादि स्वरूपलक्षणयुक्त अंतर्यामी, सर्व जीव आणि जग यांच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचे कारण असणारा ईश्वर होय. 'हा' (**एष**) शब्दाने अपरोक्ष, स्वयंप्रकाश प्रत्यगात्मा (जीवात्मा) म्हणजेच प्राण. प्राण हा शब्द अन ह्या चलनार्थी धातूपासून झालेला आहे. तो कसा आत्मा होईल? या आक्षेपाला छांदोग्य उपनिषदाच्या सातव्या अध्यायांत सनत्कुमारांनी नारदाला केलेल्या उपदेशाचा आधार घेतला आहे. नामापासून सुरुवात करून क्रमाक्रमाने वाग्, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप, तेज, आकाश, स्मृती आणि आशा

**एवं निशीथादासायं शुशोच न ददौ शवम् । संस्कर्तुं स्वालयं विप्रा जग्मुस्तत्रैव दम्पती ।।५८।।**
**ततो निशीथे सुष्वाप साध्वी स्वप्ने ददर्श सा । श्रीगुरुं प्राह सोऽप्येनां किं मयापकृतं हि ते ।।५९।।**

एवं आसायं निशीथात् शुशोच। शवं संस्कर्तुं न ददौ। विप्राः स्व+आलयं जग्मुः। दम्पती तत्र एव तस्थुः।५८। ततः निशीथे साध्वी सुष्वाप। सा स्वप्ने श्रीगुरुं ददर्श। सः अपि एनां प्राह, मया ते किं अपकृतं हि।५९।

हे उत्तरोत्तर कार्यकारणभावाने तसेच निमित्तनैमित्तिकभावाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत असे सांगून अंती आशेपेक्षांही प्राण श्रेष्ठ आहे असे सोदाहरण प्रतिपादन केले आहे. सर्व क्रिया, कारक, फल, भेद हे प्राणच आहेत हे सांगतांना, प्राणच प्राणाने चालतो, प्राणच प्राण देतो, प्राणच प्राणाला देतो; पिता प्राण, माता प्राण, भ्राता प्राण, बहीण प्राण, प्राणच आचार्य, प्राणाच्या व्यतिरिक्त कांहीच नाही असे स्पष्ट करण्यासाठी तिथे पुढे म्हटले आहे की 'आई, वडील, भाऊ, बहीण, गुरु इत्यादींचे प्राण असतील तर त्यांना दुरुत्तरे करणाऱ्याचा लोक पितृघाती, मातृघाती, गुरुघाता इत्यादि विशेषणांनी धिक्कार करतात. परंतु त्याच मातापितरादींना प्राण सोडून गेल्यावर त्यांना जाळून टाकणाऱ्याला मात्र मातृघातकी, पितृघातकी असे धिक्कार ऐकावे लागत नाहीत.' अशा रीतीने, 'प्राणच हे सर्व कांही आहे,' हे पाहणारा, विचार करणारा, समजून घेणारा अतिवादी - सर्वश्रेष्ठ तत्त्व जाणणारा होतो.

इथे कुणी असा आक्षेप घेईल की शंकराचार्यांनी शतश्लोकींत (२८) प्रतिपादल्याप्रमाणे जन्माच्या वेळी आत्मा येत नाही किंवा मृत्यूच्या वेळी जात नाही, तो अखण्ड असतो; (*'नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यन्तकाले यत्सोऽखण्डोऽस्ति लैङ्गं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक्। तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किन्तु*

**प्राणो नामैष वायुः स बहिर्यातो मुहुर्मया । आनीय पूर्ववन्न्यस्तस्त्यजातः शुचमङ्गने ।।६०।।**

एष प्राणः नाम वायुः सः बहिः यातः। स मया मुहुः आनीय पूर्ववत् न्यस्तः। अतः, हे अङ्गने, शुचं त्यज।६०।

*संस्कारजातैः तेजोमात्री गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैस्सहैव।।२८।।'*) येणे-जाणे इत्यादि लिङ्गदेहापुरते असते. तर मग प्रत्यगात्मा आला किंवा गेला असे कसे म्हणतां येईल? प्रश्नोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार रथचक्राच्या अरा जशा नाभीशी जुडलेल्या असतात तसेच ह्या इंद्रिये, मन आदी यांचा संघात असलेल्या देहांत प्रज्ञात्मा प्रवेश करून त्या सर्वांच्या नामरूपांची अभिव्यक्ती करतो. हा अनुप्रवेश आरशांत होणाऱ्या बिंबाच्या प्रवेशासारखा असतो. ते प्रतिबिंब आणि बिंब जसे एकरूप असतात तसेच जीव आणि आत्मा जाणावेत. हा जीवाविना सर्व मृत होतात; पण जीव कधीच मरत नाही (छां.उ. ६:११:३). ज्या जीवाच्या वियोगाने मृत्यू होतो त्यालाच तो जीव म्हणजे प्राण बाहेर गेला असे श्रीगुरू म्हणतात. 'तो गेलेला प्राण मी आणून पूर्ववत् जागच्या जागी ठेवला आहे. आतां तो मृत नाही. तेव्हां आतां तूं शोक सोड.' असे श्रीगुरू त्या सतीला म्हणाले. इथे गेलेले प्राण परत आणण्याविषयी सुबंधूचे प्राण त्याच्या भावांनी परत आणले तो दृष्टांत दिलेला आहे (शतश्लोकी २९). वाचा नसली तरी तो मुका म्हणून जिवंतच असतो. डोळे नसतील तर तो आंधळा झाला तरी जिवंतच असतो. कान गेलेला बहिरा जिवंतच असतो. इतकेच काय मन नसले तरी वेडा जिवंतच असतो. पण जीवा(प्राणा)शिवाय कुणी जिवंत असूं शकत नाही ह्या कौषीतकी उपनिषदाचे (३:३) वचन इथे उद्धृत केले आहे.६०.

**इति दृष्ट्वा विनिद्राऽभूद् ददर्शोत्थितमात्मजम् । हर्षशोकान्विता साध्वी प्रेम्णा भर्तारमाह्वयत् ।।६१।।**
**सोऽप्युत्थायात्मजं दृष्ट्वा रुदन्तं क्षुत्तृडाकुलम् । मन्त्रवत् त्रिरवघ्राय मूर्ध्न्यस्तौषीत्परात्परम् ।।६२।।**
**अत्रान्तरे प्रातरभूद् दग्धुं प्रापुः शवं द्विजाः । ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा सर्वं श्रुत्वाऽस्तुवन्हरिम् ।।६३।।**
**दम्पती तु ततः स्नात्वा प्रपूज्येशं सुविस्तरात् । नीराज्याभ्यर्च्य भूदेवान्जग्मतुर्निजमन्दिरम् ।।६४।।**
**विद्याविनयसंपन्नश्चिरजीवी स भाग्यभाक् । बभूवाप्येवमेवान्य आसन्पूर्णमनोरथाः ।।६५।।**

इति (स्वप्नं) दृष्ट्वा (सा) विनिद्रा अभूत्। उत्थितं आत्मजं ददर्श। हर्ष+शोक+अन्विता साध्वी प्रेम्णा भर्तारं आह्वयत्।६१। सः अपि उत्थाय रुदन्तं क्षुत्+तृड्+आकुलं आत्मजं दृष्ट्वा मूर्ध्निः मन्त्रवत् त्रिः अवघ्राय परात्परं अस्तौषीत्।६२। अत्र अंतरे प्रातः अभूत्। द्विजाः शवं दग्धुं प्रापुः। ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा, सर्वं श्रुत्वा हरिं अस्तुवन्।६३। ततः दम्पती तु स्नात्वा ईशं सुविस्तरात् प्रपूज्य नीराज्य भूदेवान् अभ्यर्च्य निजमन्दिरं जग्मुः।६४। सः विद्या+विनय+संपन्नः चिरजीवी भाग्यभाक् बभूव। अन्ये अपि एवं एव पूर्णमनोरथाः आसन्।६५।

असे सर्व स्वप्नांत पाहून ती साध्वी जागी होऊन पाहते तर तिचा मुलगा उठून बसला होता. ते पाहून तिच्या मनांतल्या शोकाची जागा आनंदाने घेतली. ओठांवर हसू आणि डोळ्यांत पाणी अशी कांहीशी तिची अवस्था झाली. तिने प्रेमाने आपल्या हांक मारली.६१. तिच्या पतीनेही उठून आपल्या भुकेने आणि तहानेने व्याकुळ होऊन रडणाऱ्या मुलाला पाहून जवळ घेतले आणि त्याच्या डोक्याचे मंत्राने अवघ्राण केले आणि परमेश्वराची स्तुती केली.६२. थोड्या वेळाने सकाळ झाली आणि गांवातील ब्राह्मणवर्ग मुलाचे शव दहन करण्यासाठी आले. तेव्हां मलगा जिवंत झालेला पाहून आणि सर्व वृत्तांत ऐकून त्यांनीही भगवंताची स्तुती आरंभिली.६३. त्यानंतर त्या जोडप्याने श्रीगुरूंच्या पादुकांची सविस्तर पूजा करून आरती केली, ब्राह्मणांची पूजा करून आणि त्यांना भोजन घातले. नंतर सर्वजण आपापल्या घरी परतले.६४. तो पुनरुज्जीवित पुत्र विद्या आणि विनयांनी संपन्न, दीर्घजीवी आणि भाग्यवंत झाला. दुसरेही अनेक भक्त याचप्रमाणे श्रीगुरूंच्या कृपेने आपल्या कामना पूर्ण करून घेऊन सुखी झाले.६५.

**तत्राऽश्रान्तं स जागर्ति श्रीनृसिंहसरस्वती । अद्य कालान्तरेऽप्येवं न निद्रात्यन्यवत्कलौ ।।६६।।**
**तत्रेशमाद्यं दृढभक्तियुक्ता भजन्ति ये केऽपि सदुक्तिसक्ताः**
**ते प्राप्नुवन्ति द्रुतमिष्टकामान्निदर्शनं त्वत्र सती सुकामा ।।१।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे प्रेतसंजीवनं नाम द्वादशोऽध्यायः ।।१२।।**

तत्र सः श्रीनृसिंहसरस्वती कालान्तरे अद्य अपि अश्रान्तं जागर्ति। कलौ अन्यवत् न निद्राति।६६। तत्र आद्यं ईशं ये के अपि सत्+उक्ति+सक्ताः दृढ+भक्ति+युक्ताः भजन्ति ते द्रुतं इष्ट+कामान् प्राप्नुवन्ति। अत्र निदर्शनं तु सुकामा सती।१।

त्या कृष्णातीरावर औदुंबराच्या छायी तो भक्तकामकल्पद्रुम श्रीनृसिंहसरस्वती श्रीगुरू, शेकडो वर्षांचा काळ लोटूनही आजही अविश्रांत जागतो आहे. कलियुगांतही अन्य देवतांप्रमाणे तो झोप घेत नाही.६६. (क्षेपक) जे कुणी संतांच्या वचनावर विश्वास ठेवून त्या पादुकांची दृढ भक्तीने उपासना करतात त्यांच्या ईप्सित कामना शीघ्रच पूर्ण होतात. इष्टार्थ पावलेली ती शिरोळची सती हे त्याचे एक उदाहरण आहे.१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा बारावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# त्रयोदशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**आसाद्य भगवान्भीमां ततः किमकरोत्प्रभुः । श्रद्दधानाय मे शंस दुर्ग्रहं तस्य चेष्टितम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गान्धर्वनगरे भीमामरजा संगमे शुभे । कृष्णापञ्चनदीयोग-तुल्ये तस्थौ जगत्प्रभुः ।।२।।**

**स्थित्वात्र गुप्तभावेन तत्रत्यब्राह्मणालयम् । गत्वा भिक्षां ययाचेऽसौ भक्तोद्धरणहेतवे ।।३।।**

नामधारक उवाच। भगवान् भीमां आसाद्य ततः प्रभुः किं अकरोत्? दुर्ग्रहं (अपि) तस्य चेष्टितं श्रद्दधानाय मे शंस।१। सिद्ध उवाच। कृष्णा+पंचनदी+योग+तुल्ये शुभे भीमा+अमरजा सङ्गमे गान्धर्वनगरे जगत्+प्रभुः तस्थौ।२। अत्र गुप्तभावाने स्थित्वा तत्रत्य+ब्राह्मण+आलयं गत्वा असौ भक्त+उद्धरण+हेतवे भिक्षां ययाचे।३।

**श्रीगणेशाय नमः। तेराव्यांत वांझ महिषी दुभवुनि घेई राजाची सेवा। ब्रह्मराक्षसा देउनि सद्गति दाविति सद्गुरु विश्वरूप यतीला।।** अशा रीतीने मागील अध्यायात तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच श्रीगुरूंचे भक्तवात्सल्यही दर्शविले. आता आपल्या आचरणांतून रागद्वेषरहित जीवन्मुक्त जगाला कसे पावन करतात ते दाखवून रागद्वेष न सुटलेला, जरी तो संन्यासी असला तरी, कृतार्थ होत नाही हे दाखविले आहे. नामधारक सिद्धमुनींना विचारतात, भगवान दत्तप्रभूंनी भीमातीराला येऊन काय लीला केली? खरोखर त्यांची लीला सामान्य मानवी बुद्धीला आकलन होण्यास कठीण आहे. तरीही श्रद्धेमुळे ती जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.१. सिद्ध मुनी उत्तरले, कृष्णा-पंचगंगा संगामासारख्याच पावन अशा भीमा-अमरजा संगमासन्निध गाणगापूरला सद्गुरूंनी वास केला.२. आपले माहात्म्य प्रकट न करतां तिथे संगमावरच राहून गाणगापूरांतल्या ब्राह्मणांच्या घरी भक्तांच्या उद्धारासाठीच ते भिक्षा मागीत असत, भूक शमविण्यासाठी नव्हे. कारण त्यांना तहान-भूक इत्यादि विकार नसतात.३.

**दीनभाविकसद्विप्र-दत्तभिक्षाप्रियं द्विजाः । श्रीविद्याढ्या हसन्ति स्म श्रीशं भक्तिप्रियं हरिम् ।।४।।**
**यथार्के प्रसरत्यभ्र-च्छन्नेऽपि द्योत इद्यथा । सम्पुटस्थितकस्तूरी-गन्धस्तद्वद्धरेर्गुणाः ।।५।।**
**एकदा दीनविप्रस्य गेहे च्युतरदां वशाम् । महिषीं प्रेक्ष्य स प्राह ब्राह्मणीं देहि मे पयः ।।६।।**
**सा प्राहेयं वशा भार-वाहिनी नासिकागुणा । योगक्षेममितोऽस्माकं जन्मतोऽपि लुलायवत् ।।७।।**
**मृषा मा वद तां दुग्ध्वा क्षीरं देहीति भाषिता । गुरुणापि वशां दुग्ध्वा काष्ठपात्रेऽलभत्पयः ।।८।।**

दीन+भाविक+सत्+विप्र+दत्त+भिक्षा+प्रियं श्री+ईशं भक्ति+प्रियं हरिं श्री+विद्या+आढ्याः द्विजाः हसन्ति स्म।४। अर्के अभ्र+च्छन्ने अपि यथा द्योत प्रसरति, (यथा वा) सम्पुट+स्थित+कस्तूरी+गंधः इत् तत्+वत् हरेः गुणाः प्रसरन्ति।५। एकदा दीन+विप्रस्य गेहे च्युत+रदां वशां महिषीं प्रेक्ष्य सः ब्राह्मणीं प्राह, मे पयः देही।६। सा प्राह, 'इयं वशा, भारवाहिनी, नासिका+गुणा। जन्मतः अपि लुलायवत्। इतो अस्माकं योगक्षेमम्।'७। 'मृषा मा वद। तां दुग्ध्वा क्षीरं देहि' इति गुरुणा भाषिता वशां अपि दुग्ध्वा काष्ठ+पात्रे पयः अलभत्।८।

लीन, भाविक आणि सदाचारी ब्राह्मणांचीच भिक्षा आवडीने घेणाऱ्या भक्तीचा चाहता अशा त्या लक्ष्मीपती हरीचा गाणगापुरांतील धनवान आणि सुविद्य आणि म्हणूनच गर्विष्ठ असलेले ब्राह्मण कुचेष्टेने उपहास करीत.४. ढगांनी आच्छादलेल्याही सूर्याचा प्रकाश जसा फांकतो, किंवा बंद डबीतील कस्तूरीचासुद्धां सुगंध दरवळतोच त्याचप्रमाणे श्रीगुरूंचे गुणही लवकरच प्रकट झाले.५. एकदा अशाच एका गरीब ब्राह्मणाच्या घरी श्रीगुरू भिक्षेला गेले असतां अन्न तयार नसल्याचे पाहून त्यांनी ब्राह्मणीला भिक्षेसाठी दाराजवळच बांधलेल्या, दांत पडलेल्या वांझ म्हशीची धार काढून दूध द्यायला सांगितले.६. ती गृहिणी म्हणाली 'अहो, ही वांझ म्हैस आहे. जन्मापासूनच आम्ही हिला रेड्यासारखी पोसली आहे. नाकांत वेसण घालून हिला ओझे वाहण्याच्या कामाला देतो. त्यावरच आमचा चरितार्थ चालतो.'७. त्यावर श्रीगुरू म्हणाले, 'उगीच खोटे बोलूं नकोस, (लवकर) तिची धार काढून मला दूध दे!' हे श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्या ब्राह्मणीने त्या वांझ म्हशीचीच धार काढायला घेतली. तो काय आश्चर्य, ते लाकडी भांडे दुधाने भरले!८.

**विस्मिता सार्पयत्तस्मै कोष्णं कृत्वा पयो मुदा । पीत्वा क्षीरं ययौ प्रेम्णा श्रीगुरुः संगमं द्रुतम् ।।९।।**
**तत एत्य गृहेशोऽदः श्रुत्वा सस्त्रीक एत्य तम् । गुरुं संपूज्य लब्धेष्ट-वरो हृष्टोऽन्वगाद्गृहम् ।।१०।।**
**अन्येद्युर्भारवाहार्थं वशामाहर्तुमागताः । कृषीवलाः प्रेक्ष्य दोहं शशंसुर्द्राङ् नृपाय तत् ।।११।।**
**नृपोऽप्याकर्ण्य विप्रात्तच्चतुरङ्गबलान्वितः । गुर्वर्थं राजचिह्नानि गृहीत्वा सङ्गमं ययौ ।।१२।।**
**तमेत्य प्रणिपत्योचे दण्डवद्गद्गदाक्षरः । पुलकाङ्कितदेहो राड् दीनं माम्पाहि किङ्करम् ।।१३।।**

सा विस्मिता पयः कोष्णं कृत्वा मुदा तस्मै अर्पयत्। श्रीगुरुः प्रेम्णा क्षीरं पीत्वा द्रुतं संगमं ययौ।९। ततः गृह+ईशः एत्य अदः श्रुत्वा गुरुं एत्य तं संपूज्य लब्ध+इष्ट+वरः हृष्टः गृहं अन्वगात्।१०। अन्ये द्युः भारवाहार्थं वशां आहर्तुं आगताः कृषीवलाः दोहं प्रेक्ष्य तत् द्राक् नृपाय तत् शशंसुः।११। नृपः अपि विप्रात् तत् आकर्ण्य चतुः+अंग+बल+अन्वितः गुरु+अर्थं राज+चिह्नानि गृहीत्वा संगमं ययौ।१२। तं एत्य दण्डवत् प्रणिपत्य गद्गद+अक्षरः पुलकाङ्कित+देहः राट् ऊचे, 'मां किङ्करं पाहि।'१३।

आश्चर्यचकित झालेल्या त्या स्त्रीने ते दूध किंचित् गरम करून श्रीगुरूंना दिले. त्यांनीही अत्यंत प्रेमाने ते पिऊन टाकले आणि लगेच ते संगमाकडे निघून गेले.९. कांही काळाने गृहस्वामी परतले आणि ही सर्व घटना पत्नीकडून ऐकली. लगेच तिला घेऊन ते संगमावर गेले आणि त्यांनी श्रीगुरूंची उत्तम प्रकारे पूजा केली. सद्गुरूंनी प्रसन्न होऊन त्यांना ईप्सित वर दिला आणि आनंदभरित होऊन ते दंपती आपल्या घरी परतले.१०. दुसऱ्या दिवशी कांही शेतकरी ओझे वाहण्यासाठी ती म्हैस घेऊन जायला आले असतां त्यांनी ती दुभती झाल्याचे पाहिले. ते ताबडतोब राजाकडे गेले आणि त्याला हा चमत्कार निवेदन केला.११. राजानेही ब्राह्मणाकडून सर्व खातरजमा करून घेतली आणि आपली चतुरंग सेना बरोबर घेऊन, श्रीगुरूंसाठी पालखी, छत्र-चामरादि राजचिह्ने घेऊन संगमावर आला.१२. ह्या भगवल्लीलेचे श्रवण करून त्या शुद्ध अंतःकरणाच्या राजाचा भक्तिभाव उफाळून आला आणि तो नम्रपणे त्यांच्याकडे आला. श्रीगुरूंजवळ येऊन राजाने दण्डवत घातला. त्याचे अष्ट सात्त्विक भाव उचंबळून आले. रोमांचित होऊन तो सद्गदित आवाजांत म्हणाला, 'ह्या दासाला पदरांत घ्या!'१३.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**दण्डी वनचरोऽस्म्यङ्ग भिक्षुस्त्वं सेनया सह । राजन्कस्मादिहानन्द-संरम्भादागतोऽसि किम् ।।१४।।**

**।। राजोवाच ।।**

**भवान्मायानरो भिक्षुर्नैवास्ति परमेश्वर । हित्वारण्यविहारं भो पावनं कुरु मे पुरम् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) अङ्ग! (अहं) दण्डी वनचरः भिक्षुः अस्मि। (हे) राजन्, इह आनंद+संरम्भात् कस्मात् आगतः असि? किम् (कार्यम्)?'१४. राजा उवाच। '(हे) परमेश्वर, भवान् माया+नरः अस्ति। नैव भिक्षुः। भो, अरण्य+विहारं हित्वा मे पुरं पावनं कुरु।'१५।

श्रीगुरूंनी विचारले, 'अरे राजा, मी तर एक वनवासी, दंडधारी संन्यासी आहे. राजेसाहब, इतक्या आनंदाने आणि समारंभपूर्वक कशासाठी येणे केले? आपले माझ्याकडे काय काम आहे?'१४. राजा म्हणाला, 'भगवंता, आपण मानुष रूप घेतले असले तरी ते आपले खरे स्वरूप नाही. आपण सामान्य संन्यासी तर मुळीच नाहीत. आपण स्वीकारलेला हा वनविहार सोडून माझ्या नगरीत वास करून तिला पावन करावे.' **पुरं** या शब्दाचा दुसरा अर्थ हे मानवी शरीर असाही होतो. याला डोक्यावर सात (डोळे, कान, नाकपुड्या आणि मुख) आणि खाली बेंबीसहित समोरची तीन आणि टाळू अशी अकरा दारे आहेत; दिशा, वायू इत्यादि द्वारपाल आहेत; त्वचा, मांस, रक्त, मेद (चरबी), अस्थी व स्नायू हे प्राकार (दालने) आहेत; मूलाधारापासून आज्ञा पर्यंतची चक्रे ह्या अट्टालिका (galleries) आहेत; रोमरूपी वृक्षांनी त्याचा परिसर बहरलेला आहे; आणि सप्त धातूंनी ते पुरेपूर भरलेले आहे. कठोपनिषदांत (२:२:१) एकादश दारांचे नगर असे म्हटलेलेच आहे. श्रीमद्भगवद्गीतेतही (५:१३) 'नवद्वारे पुरे' असा उल्लेख आहे. हे माझे शरीर मलमूत्रादींनी अपवित्र असले तरी तेच आत्मज्ञानाचे एकमेव साधन असल्याने, आपण ते पावन करावे म्हणजेच आत्मज्ञानाला योग्य करावे, असा त्या राजाच्या प्रार्थनेचा भाव आहे.१५.

**इत्थं श्रुत्वा सकारुण्यमुदारं वाक्यमच्युतः । तथेत्युक्त्वाऽऽययौ प्रेम्णा पुरं पावनपावनः ।।१६।।**
**भेजे छत्रप्रकीर्णै राट् पादचारी सुखासने । उपवेश्य गुरुं विप्र-वाहिते तूर्यनिःस्वनैः ।।१७।।**
**वेदघोषं द्विजाश्चक्रुर्मागधाः स्तोत्रमुत्तमम् । जयघोषं तथाप्यन्य एवं गोपुरमागतः ।।१८।।**
**गुरुः प्रत्यक्पथं पुर्या एत्वाऽश्वत्थे भयङ्करम्। स ब्रह्मराक्षसं शक्रं ददर्शातीन्द्रियः प्रभुः ।।१९।।**
**तद्दर्शनान्नराद्भूत्वा प्रशान्तो ह्यवरुह्य सः । गुरुं नत्वोद्धर हरे कुयोनेर्मेत्युवाच तम् ।।२०।।**

इत्थं सकारुण्यं उदारं वाक्यं श्रुत्वा पावनपावनः अच्युतः 'तथा' इति उक्त्वा पुरं आययौ।१६। राट् (स्वयं) पादचारी गुरुं विप्र+वाहिते सुखासने उपविश्य छत्र+प्रकीर्णैः भेजे।१७। द्विजाः वेदघोषं चक्रुः, मागधाः उत्तमं स्तोत्रं (चक्रुः), तथा अन्ये अपि जयघोषं चक्रुः। एवं गोपुरं आगतः।१८। गुरुः प्रत्यक्+पथं पुर्या एत्वा सः अतीन्द्रियः प्रभुः अश्वत्थे भयङ्करं शक्रं ब्रह्मराक्षसं ददर्श।१९। तत्+दर्शनात् सः प्रशांतः भूत्वा नरात् अवरुह्य गुरुं नत्वा तं उवाच, '(हे) हरे मे कुयोनेः उद्धर', इति।२०।

हे त्याचे काकुळतीचे पण प्रौढ बोलणे ऐकून अग्नी, वायू, सोम, सूर्य, इन्द्र इत्यादि पावन देवतांनाही पावन करणारे अच्युत श्रीगुरु 'ठीक आहे,' असे म्हणून नगराकडे निघाले.१६. स्वतः पायउतार होऊन राजाने श्रीगुरूंना ब्राह्मणांनी वाहिलेल्या पालखीत बसविले आणि त्यांच्यावर छत्र-चामर धरून, मंगलवाद्यांच्या गजरांत नगराकडे आणले.१७. ब्रह्मवृंद वेदमंत्रांचा घोष करीत होते, भाट उत्तम स्तवनांनी स्तुती करीत होते आणि इतरही सगळे श्रीगुरूंचा जयजयकार करीत होते. अशा रीतीने ती मिरवणूक गांवाच्या वेशीजवळ आली.१८. श्रीगुरूंनी पश्चिमेकडील वाटेने नगरांत प्रवेश करतांच त्यांना समोरच्या पिंपळावर एक भयानक आणि घातक ब्रह्मराक्षस दिसला. **अतींद्रिय** या विशेषणाने श्रीगुरूंचे इंद्रियातीत विषयांचे ज्ञान सूचित केले आहे. तसेच **प्रभुः** या विशेषणाने त्यांचे निग्रहानुग्रह सामर्थ्यही सूचित केले आहे.१९. त्या श्रीगुरूंच्या दर्शनाने तो राक्षस एकदम शांत झाला. पिंपळावरून उतरून श्रीगुरूंना नमस्कार करून तो म्हणाला, 'हे हरी, या कुत्सित योनींतून मला मुक्त करा.'२०.

**करस्तन्मूर्ध्नि विन्यस्तो गुरुणाथाभवन्नृवत् । तमाह संगमस्नानाच्छीघ्रं मुक्तो भविष्यसि ।।२१।।**
**इति श्रुत्वा नमस्कृत्य गुरुं स्नात्वा स संगमे । विहाय भौतिकं कायं मुमुचे कर्मबन्धनात् ।।२२।।**
**दृष्ट्वेदं राडभिष्टूय तस्मा आम्रेडितोक्तिभिः । पुरं नीत्वा सुमठिकां निर्मायास्मा उपानयत् ।।२३।।**
**खेदं विनयते स्मेश-पूजारार्तिकगायनैः । घोरं सांसारिकं प्रेम्णा नित्यं तदनुगो नृपः ।।२४।।**

गुरुणा तत्+मूर्ध्नि करं विन्यस्तः। अथ स नृवत् अभवत्। तं (श्रीगुरुः) आह, 'संगम+स्नानात् शीघ्रं मुक्तः भविष्यसि।'२१। इति श्रुत्वा सः गुरुं नत्वा, संगमे स्नात्वा, भौतिकं कायं विहाय कर्म+बंधनात् मुमुचे।२२। इदं दृष्ट्वा राट् तस्मै आम्र+ईडित+उक्तिभिः अभिष्टूय पुरं नीत्वा सुमठिकां निर्माय अस्मै उपानयत्।२३। सः संगमे आह्निकं, ग्रामे भिक्षां, मठे निवसतिं कृत्वा भगवान् भक्त+वात्सल्यात् राण्+निघ्नः अभूत्।२४।

श्रीगुरूंनी त्याच्या मस्तकावर हात ठेवतांच त्याचा देह मानवसदृश झाला. त्याला श्रीगुरू म्हणाले, 'संगमात स्नान केलेस की लगेच तूं मुक्त होशील.'२१. हे श्रीगुरूंचे शब्द कानांवर पडतांच तो त्यांना नमस्कार करून संगमावर गेला. तिथे स्नान करून त्याने पांचभौतिक देहाचा त्याग केला आणि तो कर्मबंधनांतून मुक्त झाला.२२. हा सर्व चमत्कार पाहून राजाने पुनःपुनः स्तुतिवचनांनी त्यांचा गौरव केला आणि त्यांना गाणगापुरांत घेऊन गेला. तिथे त्याने एक सुंदरशी मठी बांधून ती श्रीगुरूंना राहण्यासाठी अर्पण केली.२३. ते श्रीगुरू संन्यासाश्रमाला उचित असे शौच, स्नान, दंडतर्पण, ॐकाराचा जप, भिक्षा, ध्यान इत्यादि आह्निक संगमावर करीत; भिक्षेसाठी गांवांत येत; आणि मठांत निवास करीत. ज्ञानी पुरुषांनीसुद्धां लोकसंग्रहासाठी नित्यकर्माचे अनुष्ठान करावे ह्या सत्संप्रदायाचा धडाच ते स्वतःच्या आचरणांतून घालून देत होते. भक्तवत्सल प्रभू राजाचा भाव पाहून त्याच्या अधीन राहत. त्याच्या इच्छेनुसार वागत.२४.

**आह्निकं संगमे भिक्षां ग्रामे निवसतिं मठे । स कृत्वा भक्तवात्सल्याद्राण्निघ्नो भगवानभूत् ।।२५।।**
**श्रुत्वाऽऽश्रमानर्हचेष्टामस्यामंस्ताल्पधीर्यतिः । भ्रष्टोऽयं दाम्भिक इति तं त्रिविक्रमभारती ।।२६।।**
**तज्ज्ञात्वाशेषहृत्संस्थः सर्वसाक्षी जगत्प्रभुः । भूपं प्राहाद्य गन्तव्यं निन्दकार्दनहेतवे ।।२७।।**
**मन्निन्दकोऽस्ति कुमसी-ग्रामे भिक्षुस्त्रिविक्रमः । इति श्रुत्वा नृपो हृष्टो गमनायोपचक्रमे ।।२८।।**

नृपः ईश+पूजा+आरार्तिक+गायनैः घोरं सांसारिकं खेदं विनयते स्म प्रेम्णा नित्यं तत्+अनुगः (अभूत्)।२५। आश्रम+अनर्ह+चेष्टा श्रुत्वा अल्पधीः त्रिविक्रमभारती यतिः अयं भ्रष्टः दाम्भिकः इति अमंस्त।२६। अशेष+हृत्+संस्थः सर्वसाक्षी जगत्+प्रभुः तत् ज्ञात्वा भूपं प्राह, निंदक+अर्दन+हेतवे गन्तव्यम्।२७। कुमसी+ग्रामे त्रिविक्रमः भिक्षुः मत्+निंदकः अस्ति। इति श्रुत्वा हृष्टः नृपः गमनाय उपचक्रमे।२८।

राजा नित्यनेमाने श्रीगुरूंची पूजा, आरती आणि भजन करून आपल्या घोर प्रापंचिक दुःखांचे उपशमन करू लागला आणि प्रेमभक्तीपूर्वक त्यांचा अनुचर होऊन राहिला. साध्या गायनाच्या श्रवणानेही श्रोता तल्लीन होऊन आपल्या शारीरिक दुःखाचा ठणका कांही काळ तरी विसरतो. मग ईश्वराच्या पूजा, आरती आणि भजनानेही विद्यमान त्रिविध सांसारिक तापांचे शमन होतेच यांत काय आश्चर्य?२५. श्रीगुरूंच्या ह्या संन्यासाश्रमाला अनुचित अशा वर्तनाने जवळच कुमसी गांवात राहणाऱ्या त्रिविक्रमभारती नांवाच्या संन्याशाने, अल्पबुद्धीने श्रीगुरूंविषयी, ‘ हा भ्रष्ट आणि दांभिक संन्यासी आहे,’ असा समज करून घेतला.२६. त्या त्रिविक्रमभारतीच्या मनांतला हा किंतु सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी जगदीशच असलेल्या श्रीगुरूंपासून लपून राहिला नाही. ते राजाला म्हणाले, ‘आपल्याला एका निंदकाला धडा शिकविण्यासाठी जायचे आहे.’२७. ‘कुमसी गांवी त्रिविक्रम नांवाचा संन्यासी माझी निंदा करतो.’ हे ऐकून सद्गुरूंच्या सेवेची संधी मिळाल्याने आनंदित होऊन राजाने जाण्याची सर्व तयारी केली. इथे राजा कदाचित् ‘आपण कशाला कष्ट घेतां? मीच त्या निंदकाला शिक्षा करतो,’ असे म्हणेल यासाठी तो निंदक संन्यासी आहे हे श्रीगुरूंनी स्पष्ट केले आहे. संन्याशाला, तो अपराधी असला तरी, दंड करण्याचा अधिकार राजाला नाही हे सूचित केले आहे.२८.

**सुपालके तूपवेश्य नृपचिह्नैः परिष्कृतम् । श्रीगुरुं कुमसीग्रामं निन्ये राड् यत्र भारती ॥२९॥**
**नृसिंहध्याननिष्ठोऽपि स तदा योगिमायया । सम्भूय चञ्चलमना आजह्रे स्तोतुमीश्वरम् ॥३०॥**
**सुप्रसन्न नृसिंहेश दयाब्धे भक्तभावन । कस्मात्तेऽद्य न सामीप्यं ध्याने स्तोष्ये दयस्व भोः ॥३१॥**
**स्तुत्वैवं स नदीतीरे ध्यानाज्ज्ञात्वा स्थितं विभुम् । त्रस्तचित्तोऽभ्यगाद् द्रष्टुमचिन्त्याव्यक्तविग्रहम् ॥३२॥**
**त्रिविक्रमो जवेनैत्य योगिमायावृतान्तरः । उच्चावचान्यतीन्दृष्ट्वा भूरिशो मोहमाप सः ॥३३॥**

नृपचिह्नैः परिष्कृतं श्रीगुरुं सुपालके तु उपवेश्य राड् कुमसीग्रामे, यत्र भारती, निन्ये।२९। सः नृ+सिंह+ध्यान+निष्ठः अपि तदा योगि+मायया चञ्चल+मना सम्भूय ईश्वरं स्तोतुं आजह्रे।३०। (हे) नृसिंह+ईश, दया+अब्धे भक्त+भावन, अद्य ध्याने कस्मात् ते सामीप्यं न? भोः दयस्व, स्तोष्ये।३१। एवं स्तुत्वा स ध्यानात् विभुं नदीतीरे स्थितं ज्ञात्वा त्रस्त+चित्तः अचिन्त्य+अव्यक्त+विग्रहं द्रष्टुं अभ्यगात्।३२। योगि+माया+आवृत+अंतरः त्रिविक्रमः जवेन एत्य भूरिशः उच्च+अवचान् यतीन् दृष्ट्वा सः मोहं आप।३३।

छत्र-चामरादि राजचिह्नांनी सजविलेल्या श्रीगुरूंना उत्तम पालखीत बसवून राजाने त्यांना कुमसी गांवी त्रिविक्रमाकडे नेले.२९. **नृ** म्हणजे जीव, त्याची **सिं** म्हणजे अविद्या **ह** म्हणजे हरण करणारा जो परमात्मा त्या नृसिंहाचे ध्यान त्रिविक्रम यती करीत असत. त्या वेळी मात्र त्यांच्या ध्यानात नेहमी येणारे नरसिंहाचे रूप योगेश्वर श्रीगुरूंच्या मायेने येईना. अशा रीतीने चलच्चित्त झालेल्या यतीने आपल्या इष्टदेवाचे - नृसिंहाचे स्तवन आरंभिले. 'हे दयासागरा, भक्तपालका नृसिंहदेवा, आज ध्यानांत आपण कां बरे येत नाहीत? देवा, दया करा, मी आपले स्तवन करीत आहे!'३१. अशी स्तुती केल्यानंतर त्या त्रिविक्रमाने ध्यानाने प्रभू नदीकांठी असल्याचे जाणून तो ज्याचे स्वरूप अचिंत्य आणि अव्यक्त आहे अशा भगवंताच्या दर्शनासाठी व्याकुळ मनाने नदीकांठी आला.३२. श्रीगुरूंच्या मायेचा चित्तावर पगडा असलेला त्रिविक्रम धावत धावतच तिथे येऊन पाहतो तर त्याला जिकडे तिकडे लहान-मोठे खूपसे संन्यासीच दिसू लागले. त्या विपरीत दर्शनाने त्याचा विवेक हतबल झाला आणि तो पुरता गोंधळून गेला.३३.

**व्यालोकि परितस्तेन सर्वे संन्यासिरूपिणः । ज्यायांसोऽपि कनीयांसः प्रशान्ता दण्डिनोऽमिताः ॥३४॥**
**आहेशो विस्मितं तं यं धिक्करोष्यस्मि दाम्भिकः । भ्रष्टः स इन्मयोद्भाव्य मायामसि परीक्षितः ॥३५॥**
**नृसिंहचिन्तकोऽसि त्वं यतिधर्मसुशिक्षितः । संन्यासी लोकविज्ञातः संन्यस्तं ब्रूहि किं त्वया ॥३६॥**
**न्यस्तसूत्रशिखो दण्डी रागद्वेषाकुलान्तरः । वेषानुकारी संन्यासी धर्मज्ञो वा भवेदपि ॥३७॥**

ईशः तं विस्मितं आह, 'यं धिक्+करोषि सः दाम्भिकः भ्रष्टः अस्मि। इत् मया मायां उद्भाव्य परीक्षितः असि।'३४। तेन परितः सर्वे ज्यायांसः कनीयांसः अपि प्रशांता अमिताः संन्यासिरूपिणः दण्डिनः व्यालोकि।३५। 'त्वं नृसिंह+चिंतकः यति+धर्म+सुशिक्षितः संन्यासी असि। त्वया किं संन्यस्तं?' ब्रूहि।३६। न्यस्त+सूत्र+शिखः दण्डी वेष+अनुकारी धर्मज्ञः वा राग+द्वेष+आकुल+अंतरः संन्यासी भवेत् अपि?३७।

त्याला आजूबाजूला सगळीकडे लहान-थोर अगणित दंड धारण केलेले प्रशांत संन्यासीच दिसूं लागले!३४. आश्चर्याने स्तिमित झालेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'ज्याचा दांभिक आणि भ्रष्ट संन्यासी म्हणून तूं धिक्कार करतोस तोच मी आहे. मीच माया पसरून तुझी परीक्षा घेत आहे.'३५. 'तू नरसिंहाचे ध्यान करतोस, संन्यासधर्माचे उत्तम शिक्षण घेतले आहेस आणि लोकांत तुझे चांगले नांव आहे! मला सांग, तू कशाचा संन्यास (त्याग) केला आहेस?'३६. 'शेंडी कापून आणि जानवे तोडून, हातांत दंड धरून, केवळ संन्याशाचा वेष धारण केला किंवा संन्यासधर्माचा कोरडा अभ्यास केला तरी, जोवर चित्त राग (आसक्ती) आणि द्वेष यांनी व्यापलेले आहे तोवर कुणी संन्यासी होईल कां?'३७.

**दम्भिलक्षणजिज्ञासुरागतोऽस्म्यद्य कृत्स्नशः । त्वं नृसिंहप्रसादेन विद्वंस्तद्वक्तुमर्हसि ।।३८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**प्रत्याहतमतिस्तेऽस्मि भगवन्नीश मायया । नापि वक्तुं हृषीकेश शक्यः पाहि दयानिधे ।।३९।।**

(अहं) दम्भि+लक्षण+जिज्ञासुः आगतः अस्मि। (हे) विद्वन् त्वं नृसिंहप्रसादेन वक्तुं अर्हसि।'३८। त्रिविक्रम उवाच। '(हे) भगवन्, ईश, (अहं) ते मायया प्रति+आहत+मतिः अस्मि। (हे) हृषीकेश वक्तुं अपि न शक्यः। (हे) दयानिधे, पाहि।३९।

'माझ्या वागण्याचा विचार करतांना तूं 'सर्वाठायी आत्मस्वरूपाचा (आपल्याच स्वरूपाचा) साक्षात्कार झाल्यावर कुणी कुणाला पाहायचे?' ह्या बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) याज्ञवल्क्याने मैत्रेयीला केलेल्या उपदेशानुसार 'आत्मसाक्षात्कारी पुरुष सर्व पाहणे, हुंगणे इत्यादि संवेदनारहित दगडासारखा क्रियाशून्य असतो' एवढेच लक्षांत घेतले. छांदोग्यांत (८:१२:३) इंद्राला प्रजापतीने सांगितले आहे की, 'आत्मज्ञानाच्या उंचीवर पोचलेला उत्तम पुरुष स्त्रियांशी वा यानांशी रमतांना दिसला तरी त्याला देहात्मभाव नसतो.' हे तूं विसरलास! आत्मदर्शनाच्या विषयी सांख्यांनी तो देहापासून वेगळा असल्याचे जाणूनही, वेदांचा सिद्धांत न मानल्याने बुद्धी आणि आत्मा यांच्या भेदज्ञानाशीच ते अडून राहिले; कणादादि वैशेषिक विविध रंगांच्या क्षारांत वस्त्राचा शोध घ्यावा तसे नऊ गुणांनी युक्त (गुणातीत) आत्मतत्त्वाचा मागोवा घेत राहिले; तसेच कर्मिष्ठ पूर्वमीमांसक वेदांचे प्रामाण्य मानूनही बाह्य विषयांतच चित्त हरवून बसले आणि त्यांना आत्मैक्यरूप परमार्थसत्य नाशिवंत भासले; हे सगळे रहाटगाडग्यासारखे फिरतच राहिले. संन्यासी असूनही - शांकर अद्वैत सिद्धांताचा स्वीकार करूनही, तुझी त्यांच्यासारखीच अवस्था झालेली दिसते. तूं मला दाम्भिक म्हणतोस ना? तर दाम्भिकाची काय लक्षणे असतात ते तुझ्याकडून समजून घ्यायला मी आलो आहे.'३८. त्रिविक्रम म्हणाला, 'भगवंता, परमेश्वरा, तुझ्या मायेने माझी बुद्धी कुंठित झाली आहे. सर्व इंद्रियांच्या नियंत्या, मला कांही बोलणेही अशक्य झाले आहे. दयासागरा, माझे रक्षण करा!'३९.

**प्रपन्नोऽस्मि क्षमस्वेश मन्तून्मे ध्यानपुण्यतः । साक्षाद्दृष्टं हि ते धाम नृसिंहोऽसि दयस्व भोः ।।४०।।**
**इति स्तुवति तस्मिन्स भगवान्पूर्वरूपतः । प्रादुरासीत्तथाप्यन्ये सैन्या मन्त्री नृपः स्फुटम् ।।४१।।**
**सैन्यमध्ये स्थितं भूप-वीजितं च त्रिविक्रमः । विश्वरूपं स्वनेत्रेण न शशाकापि वीक्षितुम् ।।४२।।**
**तमाह दुर्निरीक्ष्यं मे रूपं दिव्यदृशापि ते । दर्शितं ध्यानहृष्टेन धामाथो पश्य लौकिकम् ।।४३।।**
**ततः प्रशान्तसंन्यासि-रूपेणावस्थितं हरिम् । दृष्ट्वा प्रकृतिगः प्राह भगवन्तं त्रिविक्रमः ।।४४।।**

प्रपन्नः अस्मि। हे ईश, मे मन्तून् क्षमस्व। ध्यान+पुण्यतः हि ते धाम साक्षात् दृष्टम्। भोः नृसिंहः असि। दयस्व!'४०। इति तस्मिन् स्तुवति भगवान् पूर्व+रूपतः प्रादुरासीत्। तथा अन्ये, सैन्या, मन्त्री, नृपः अपि स्फुटम् (प्रादुरासीत्)।४१। सैन्यमध्ये स्थितं भूप+वीजितं विश्वरूपं त्रिविक्रमः स्वनेत्रेण वीक्षितुं न शशाक।४२। तं (श्रीगुरुः) आह। 'दिव्यदृशा अपि दुर्निरीक्ष्यं मे रूपं ध्यान+हृष्टेन (मया) ते दर्शितम्। अथो लौकिकं धाम पश्य।'४३। ततः प्रशांत+संन्यासि+अवस्थितं हरिं दृष्ट्वा प्रकृतिगः त्रिविक्रमः भगवन्तं प्राह।४४।

हे ईश्वरा! मी तुला शरण आलो आहे. माझे अपराध पोटांत घ्या. ध्यानाभ्यासाच्या पुण्याईने मला आज आपले स्वरूप साक्षात् पहायला मिळाले. आपण प्रत्यक्ष नरसिंहच आहांत! माझ्यावर दया करा.'४०. अशा प्रकारे त्रिविक्रमाची प्रार्थना ऐकून भगवान् श्रीगुरू आपल्या पूर्व रूपाने प्रकट झाले. तसेच सेनेसह राजा आणि मंत्रीगणही स्पष्ट दिसूं लागले.४१. सैन्याच्या मध्यभागी राजाने हातांतील चामर वारा घातलेले, श्रीगुरूंनी प्रकटविलेले विश्वरूप त्रिविक्रमाच्या चर्मचक्षूंना पहावले नाही. ते त्याच्या डोळ्यांत सामावेना.४२. विश्वरूपाने दिपलेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'योगादि सायास करूनही दिव्यदृष्टीलाही पहायला कठीण असे हे माझे विश्वरूप तुझ्या ध्यानाभ्यासाने प्रसन्न होऊन तुला दाखविले आहे. आतां हे लौकिक रूप पाहा.'४३. मग त्रिविक्रमाला प्रशांत संन्यासी रूपांत समोर पालखीत बसलेले पापतापहर श्रीगुरू दिसू लागले. आपल्या सहज अवस्थेत येऊन तो प्रभूंना म्हणाला.४४.

**कायेन मनसा वाचा केवलैरिन्द्रियैरपि । असत्कृतोऽसि विश्वात्मन्मया त्वां क्षामयेऽद्य तत् ।।४५।।**
**धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि कृतकार्योऽस्मि दर्शनात् । रूपं पुराऽर्जुनायेदं दर्शितं मेऽद्य तत्पुनः ।।४६।।**
**हरेऽविद्याप्रवाहे मां मज्जन्तं ज्ञाननौकया । कृपामरुत्संगतया स्वात्मरूपतटं नय ।।४७।।**

(हे) विश्व+आत्मन्, कायेन, मनसा, वाचा, केवलैः इन्द्रियैः अपि वा मया असत्+कृतः असि तत् त्वां अद्य क्षामये।४५। 'दर्शनात् धन्यः अस्मि! अनुगृहीतः अस्मि! कृतकार्यः अस्मि! पुरा इदं रूपं अर्जुनाय दर्शितं तत् अद्य पुनः मे (दर्शितम्)।४६। (हे) हरे, अविद्या+प्रवाहे मज्जन्तं मां ज्ञान+नौकया कृपा+मरुत्+संगतया स्व+आत्म+रूपं तटं नय।४७।

'हे विश्वरूप प्रभो, मी ज्या ज्या कांही शारीरिक (हातवारे करून, बोट दाखवून, तोंड वांकडे करून इत्यादि), मानसिक (आपल्याविषयी कुत्सित भाव धरून), वाचिक (धिक्कारादि उच्चारण) कृतींनी अथवा केवळ इंद्रियांनीसुद्धा आपला अधिक्षेप केला त्यांचा मला पश्चाच्चाप होत आहे. मी त्या सर्व अपराधांसाठी आपल्याजवळ क्षमायाचना करीत आहे.'४५. 'आपण दिलेल्या या दर्शनाने मी धन्य झालो आहे! अनुगृहीत झालो आहे! कृतकृत्य झालो आहे! पूर्वी अर्जुनाला दाखविलेले हे विश्वरूप आज आपण मला दखविले आहे!.४६. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा तीन प्रकारच्या दुःखांचे हरण करणाऱ्या हरी, अविद्यारूप जलप्रवाहांत बुडत असलेल्या मला, आपल्या कृपेच्या वाऱ्याने परोक्ष आत्मज्ञानरूपी नौकेला प्रेरवून, जीवात्मा आणि परमात्मा यांच्या अखंडैकरसरूपाच्या (अपरोक्ष ज्ञानरूपी) पैलतीराला पोचवा.' हा रूपक अलंकार आहे.४७.

**तीर्त्वाऽविद्यानदीं ज्ञान-प्लवेन परमं पदम् । द्राग्यास्यत्रैव तिष्ठेति तमुक्त्वा श्रीगुरुर्ययौ ।।४८।।**

श्रीगुरुः तं, 'ज्ञान+प्लवेन अविद्या+नदीं तीर्त्वा द्राक् यासि। अत्रैव तिष्ठ,' इति उक्त्वा ययौ।४८।

त्रिविक्रमाच्या प्रार्थनेवरून हा परमार्थाच्या उपदेशाला योग्य होऊन आपल्याला शरण आला आहे असे पाहून श्रीगुरूंनी त्याला सांगितले की, '*तत्त्वमसि*' इत्यादि महावाक्यांच्या श्रवणाने आणि भागत्यागलक्षणेने निश्चित केलेले अत्मस्वरूपाचे (परोक्ष) ज्ञान हीच नौका ह्या अविद्यारूपी नदीला पार करण्याचे साधन आहे. श्रवण-मनन-निदिध्यासन यांनी अभानावरणरूप अविद्येचा, आणि चिदन्वयदृष्ट्या - सर्व ठिकाणी चैतन्यच पाहत, अवशिष्ट प्रारब्धाचा भोग भोगून विक्षेपरूप अविद्येचा अपक्षय करावा. असे केल्याने देशादि परिच्छेद आणि त्रिविधभेद (सजातीय, विजातीय आणि स्वगत) यांच्या पलीकडचे योग्यांनाच लाभणारे प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अभिन्न स्वरूप ह्याच जन्मी तूं निश्चित पावशील. (तुला पुन्हां जन्म घ्यावा लागणार नाही असा आशय.) तूं इथेच स्थिर हो. इथे म्हणजे नृसिंहाचे ध्यान आणि तत्त्वज्ञानाचे विवेचन यांतच स्थिर हो म्हणजे मनाची गती थांबव. इथेच म्हणजे आत्मरूपांतच स्थिर हो. देहादि अनात्म विषयांचा विचार सोड. 'मी संन्यासी आहे, शौच, आचार, जप करणे मला आवश्यक आहे. जे संन्यासी असे करीत नाहीत ते निंद्य आहेत. जे अनुष्ठान करतात ते वंद्य आहेत' असा दुराग्रह, 'हे सर्व जगत् ईश्वराने व्यापलेले आहे' (ईशोपनिषत् १) ह्या श्रुतीला स्मरून अजिबात सोडून दे. ईशावास्यांतच (ईशोपनिषत् २, ११) 'कर्मांचे अनुष्ठान करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी', इत्यादि उपदेश असला तरी सर्व एषणांचा त्याग केलेल्या तुझ्यासारख्या अधिकारी पुरुषाला त्याचे अनुष्ठान अनुचित आहे. कारण त्याने चित्तविक्षेप होऊं शकतो, जो ज्ञानाला अडसर ठरतो.' (अर्थात परमेश्वराला विमुख असलेल्या साधनरहित सामान्य जीवांना आपापल्या आश्रमांचे अनुष्ठान केलेच पाहिजे.

**क्षणात्ससैन्यभूपेन साकमेत्य मठं प्रभुः । कर्ममार्गं ततानेशश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ।।४९।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे भीमामरजासंगमनिवासो नाम त्रयोदशोऽध्यायः ।।१३।।**

प्रभुः क्षणात् ससैन्यं भूपेन साकं मठं एत्य लोकसंग्रहं चिकीर्षुः ईशः कर्म+मार्गं ततान।४९।

अन्यथा त्यांना प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो आणि प्रपंच आणि परमार्थ या दोहोंपासून ते भ्रष्ट होतात. हे यांत सुचविलेले आहे.) असा त्याला उपदेश करून श्रीगुरू मठाला परतले.४८. मग प्रभू राजा आणि सर्व सेना यांना घेऊन योगगतीने लगेच मठाला परतले; आणि 'मीच जर आश्रमोचित कर्मांचा त्याग केला तर लोकही तसेच वागूं लागतील (भ.गीता ३:२३-२५) आणि मी अनर्थाला कारण होईन यासाठी मी स्वतः धर्माचे अनुष्ठान करून इतरांकडूनही ते करवून घेईन', अशा लोकसंग्रहाच्या इच्छेने भगवंतांनी कर्ममार्गाचा प्रसार केला.४९.

या अध्यायाबरोबरच द्विसाहस्रीतील ज्ञानकांड पूर्ण होऊन पुढच्या अध्यायापासून पांच अध्यायांत कर्मयोगाची मांडणी केली आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तेरावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।।चतुर्दशोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**ज्ञानयोग इयानुक्तः सिद्ध्यै संन्याससत्पथः। कुतो भगवता पश्चात्कर्मयोगः प्रकाशितः ।।१।।**

नामधारक उवाच। 'सिद्ध्यै संन्यास+सत्+पथः इयान् ज्ञानयोगः उक्तः। भगवता पश्चात् कुतो कर्मयोगः प्रकाशितः?१।

**श्रीगणेशाय नमः। तेरा अध्यायांत झाले ज्ञानकांडाचे निरूपण। चित्त शुद्ध जयाचे तो यायोगे तोडी कर्मबंधन।।१।। चित्त जयाचे शुद्ध नसे तयाचे पापकर्म नासून। वैराग्य उदयासाठी पांच अध्यायीं कर्मकांडविवेचन।।२।। चौदाव्या अध्यायीं मत्त ब्राह्मणां वेदसार सांगती। श्रीगुरु त्यापरी अंत्यजाकरवी विप्रगर्व परिहरती।।३।।**

नामधारक विचारीत आहे. 'ना कर्म, ना संतति ना संपत्ती या कशानेच अमृतत्वाची प्राप्ती होत नाही, ती एका त्यागानेच होते;' (कैवल्य उ. ३) 'अंधःकाराच्या पलीकडच्या त्या सूर्यसंकाश महान पुरुषाला जाणल्यानेच मृत्यूला ओलांडतां येते; यापेक्षां अन्य मार्ग नाही;' (श्वेताश्वतर उ. ३:८) 'ब्रह्माला जाणणाराच परमपद पावतो;' (तैत्तिरीय उ. २:१:१) ह्या आणि इतरही अनेक श्रुतिवचनांनी कर्मसंन्यासपूर्वक श्रवणादि साधनांनी ज्ञान झाल्यावरच मोक्षाची प्राप्ती होते असे सांगितले आहे. तसेच कर्माने जीव बांधला जातो, असे संन्यासोपनिषदांत व अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणे संन्यास हाच मोक्षाचा उत्तम मार्ग आहे असा ज्ञानयोगाचाही उपदेश केला. मग आतां भगवंत कर्ममार्गाचे प्रतिपादन कां करीत आहेत?'१.

**अविद्याघातकं कर्म तदुत्थं कथमित्यमुम् । छिन्धि मे संशयग्रन्थिम् भगवच्चरितासिना ।।२।।**

'तत्+उत्थितं कर्म कथं अविद्या+घातकम्? अमुं मे संशय+ग्रन्थिं भगवत्+चरित+असिना छिन्धि।'२।

'नवव्या अध्यायांत (द्वि.सा. ९:७०) श्रीगुरूंनीच शिष्यांना उपदेश करतांना स्वाश्रमाला उचित असे कर्म करावे अन्यथा पतन होते. असा उपदेश शिष्यांना केला आहे. मग अशी शंका कां घेतोस?' असा प्रश्न अपेक्षून नामधारक आपला प्रश्न अधिक स्पष्ट करतात. 'अविद्येपासून अविवेक, अविवेकाने देहादि उपाधींचा अभिमान, अभिमानापासून रागद्वेष आणि त्या रागद्वेषांमुळेच कर्म अशा परंपरेने कर्म हे अविद्येपासून निपजलेले आहे. तिच्यापासूनच उद्भवलेले कर्म अविद्येच्याच घाताला कसे कारण होईल? ही माझ्या मनांत पडलेली संशयाची गाठ आपण भगवच्चरित्ररूपी खड्गाने छेदावी.'२.

नामधारकाच्या प्रश्नाचे उत्तर कर्माचा आणि आत्मज्ञानाचा परस्परसंबंध समजून घेऊनच देतां येईल. याविषयी आरंभीच ब्रह्मसूत्राच्या (३:४:२५) आधारे केवळ ज्ञानानेच मोक्ष होतो, त्याला इतर कोणत्याही साधनाची अपेक्षा नाही हे दृढ करतात. सूत्रांत सांगितल्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या हेतूने सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाला अग्नी वा इंधन (समिधा) यांची उठाठेव करण्याची आवश्यकता नाही. आपल्या ज्ञानोपासनेच्याच बळावर तो आपले आत्मप्राप्तीचे ध्येय गाठूं शकतो. हा सिद्धांत दृढ केल्यावर श्रीस्वामिमहाराज त्याच्याच पुढच्या (३:४:२६) सूत्राधारे ज्ञानाच्या मोक्षप्राप्तीच्या कार्याला अन्य कशाचीही (कर्माची) अपेक्षा नसली तरी त्या ज्ञानाच्या उत्पत्तीला मात्र कर्म नितांत आवश्यक आहे. म्हणजेच कर्म हे ज्ञानाचे कारण आहे. ज्ञान आणि कर्म यांचा असा साध्य-साधन संबंध आहे. ज्ञानोत्पत्तीसाठी कर्मे दोन प्रकारे कारणीभूत होतात. १. संस्कारांनी आणि २. विविदिषा उत्पन्न करून.

**संस्कार -** गौतमसूत्रांत खालील चाळीस संस्कारांचा उल्लेख केलेला आहे.

१. गर्भाधान, २. पुंसवन, ३. सीमन्तोन्नयन, ४. जातकर्म, ५. नामकर्म, ६. अन्नप्राशन, ७. चौल, ८. उपनयन.

### ।। सिद्ध उवाच ।।

**कर्कटीं तद्भवा घ्नन्ति यथा मृत्क्षालनं मृदा । तथाऽविद्या च कर्मापि कर्मणैव विलीयते ।।३।।**

सिद्ध उवाच। 'यथा कर्कटीं तत्+भवा घ्नन्ति, मृदा मृत्+क्षालनं तथा अविद्या च कर्म अपि कर्मणा एव विलीयते।३।

९. प्राजापत्य, १०. सोम्य, ११. आग्नेय, १२. वैश्वदेव ही चार वेदव्रते.

१३. स्नान (सोडमुंज), १४. सहधर्मिणीसंयोग (विवाह).

१५. देवयज्ञ, १६. भूतयज्ञ, १७. पितृयज्ञ, १८. ब्रह्मयज्ञ आणि १९. मनुष्ययज्ञ हे पांच महायज्ञ.

२०. अष्टका, २१. अन्वष्टका, २२. पार्वणश्राद्ध, २३. श्रावणी, २४. आग्रहायणी, २५. चैत्री आणि २६. आश्वयुजी हे सात पाकयज्ञ.

२७. अग्न्याधान, २८. अग्निहोत्र, २९. दर्शपूर्णमास, ३०. आग्रयण, ३१. चातुर्मास्य, ३२. निरूढपशुबंध, ३३. सोत्रामणि हे सात हविर्यज्ञ.

३४. अग्निष्टोम, ३५. अत्यग्निष्टोम, ३६. उक्थ्यः ३७. षोळशी, ३८. वाजपेय, ३९. अतिरात्र, ४०. आप्तोर्याम हे सात सोमयाग.

'ह्या चाळीस संस्कारांनी युक्त ब्राह्मण सायुज्यता आणि सलोकता या मुक्तींचा अधिकारी होतो असे गौतम स्मृतीचे (८ः१४-२४) वचन आहे. कुठे सोळा, कुठे चोवीस तर कुठे अठ्ठेचाळीस संस्कारांचेही वर्णन आहे. ह्या संस्कारांनी संस्कारित झालेल्या पुरुषाचे चित्तच आत्मज्ञानाला योग्य होते.'

**विविदिषा -** बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे वेदाभ्यास, यज्ञ, दान, तप, उपवास यांनी ब्राह्मणाला विविदिषा उत्पन्न होते. ब्रह्मसूत्रकारांनीही आश्रमकर्म विहितच असल्याने ते केले पाहिजे (३:४:३२) असे म्हणत याचीच पुष्टी केली आहे. स्कंपुराणान्तर्गत सूतसंहितेत (यज्ञवैभव खंड २:६८-६९) असे म्हटले आहे की

महापापी लोकांना ज्ञानयज्ञाविषयी रुची तर नसतेच, उलट ते त्याचा तिरस्कारच करतात. ज्ञानाला प्रतिबंध करणारी पापे, विहित कर्मे परमेश्वरार्पण बुद्धीने केल्याने नाश पावतात. अशा रीतीने चित्तशुद्धी झाल्यानंतर श्रवणादिकांची गोडी लागते. हीच जिज्ञासा किंवा विविदिषा! वार्तिकसाराच्या (३) वचनानुसार कर्मयोगाचा अज्ञानाशी प्रत्यक्ष विरोध नसला तरी आत्मज्ञानाविषयी आवड निर्माण करून तो मोक्षाला साह्यभूत होतो. अविद्येच्या नाशाला ज्ञानच आवश्यक आहे. ज्ञानाच्या उत्पत्तीसाठी शम-दमादि संपत्तीच पाहिजे. अशा रीतीने प्रत्यक्ष नाही तरी परंपरेने कर्मयोगाचे अनुष्ठान मोक्षोपकारक ठरते. (*'रुचिद्वारोपकुर्वन्ति कर्माण्यात्मविमुक्तये। अज्ञानस्याविरोधित्वान्न साक्षादात्मबोधवत्। अविद्याया न चोच्छित्तौ ज्ञानादन्यदपेक्षते। ज्ञानोत्पत्तौ तु नैवान्यच्छमादिभ्यो ह्यपेक्षते। शमाद्युत्पत्तये नान्यद्बुद्धिशुद्धेरपेक्षते। बुद्धिशुद्धौ च नित्यादिकर्मभ्यो नान्यदिष्यते। पारम्पर्येण कर्मैवं ज्ञानायैवोपयुज्यते।।*)

कर्म हे अशा रीतीने साधन आहे ज्याचे साध्य ब्रह्मात्मज्ञान आहे असा ज्ञानकांड आणि कर्मकांड यांचा साध्यसाधनसंबंध विशद करण्यासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. गर्भाशयांत असलेली खेकडीची पिले आपल्या पायाच्या तीक्ष्ण टोकांनी आपल्याच मातेचे मृदुतर असे पोट फाडून बाहेर येतात. यावरून ज्याच्यापासून उत्पत्ती झाली त्याला तो मारीत नाही असा काही नियम नाही. जे ज्याच्या विरुद्ध ते त्याला घातकही असते. जशी भांड्याला चिकटलेली माती काढायलाही मातीचाच उपयोग होतो ना? त्याचप्रमाणे अविद्या आणि तिच्यापासून निर्माण झालेले, वरचेवर जन्माला घालणारे कर्म, दोन्हीही, माणसाने ईश्वरोपासना म्हणून, फलाची इच्छा न धरतां केलेल्या योग नावाच्या कर्माने नाश पावतात. अशा प्रकारे निष्काम कर्मयोगाचे आचरण न करणाऱ्यांना मात्र प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो; (कृ.यजुः तैत्तिरीय संहिता १:५:२) मग ज्ञानाची तर वार्ताच नको! भगवद्गीतेतही यासाठीच कर्मयोगाचा पुरस्कार केला आहे. *'तस्माद्योगाय युज्यस्व', 'योगः कर्मसु कौशलम्।। २:५०।।'*, (म्हणून तू योगाचाच अभ्यास कर; तोच कर्मबंधनांतून सुटण्याचा उपाय आहे.) *'कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्त्वा पदं गच्छन्त्यनामयम्।।२:५१।।.३.*

**साधनावधि तत्कार्य-मुपात्तपरसाधनः । ततः संन्यस्य शमवान्भवेन्नैष्कर्म्यसिद्धिभाक् ।।४।।**
**प्रकृत्युत्थगुणैः कोऽपि जात्वकर्मा न तत्फले । सक्तोऽज्ञोऽसक्त इद्विद्वानस्येदं लोकसंग्रहे ।।५।।**

'तत् साधनावधि कार्यम्। उपात्त+पर+साधनः ततः संन्यस्य शमवान् नैष्कर्म्य+सिद्धि+भाक् भवेत्।४। 'कः अपि जातुं प्रकृति+उत्थ+गुणैः अकर्मा न। तत् फले अज्ञः सक्तः, ज्ञः विद्वान् असक्तः। अस्य इदं लोकसंग्रहे।'५।

(ज्ञानी पुरुष समबुद्धीने कर्मांच्या फलाचा त्याग करून जन्मबंधांपासून सुटून निर्विकार अशा परमपदाची प्राप्ती करून घेतात.)

**ज्ञानाची साधने अंगी बाणेपर्यंत कर्म करावे -** 'मागच्या अध्यायांतील टीकेत उद्धृत केलेल्या ईशोपनिषद्वाक्यानुसार (२) कर्म करीतच शंभर वर्षे जगण्याचा श्रुतीचा आदेश आहे. तशाच जिवंत असेपर्यंत अग्निहोत्र करावे अशा आशयाच्या श्रुती आहेत. मग आयुष्य सगळे कर्मानेच व्यापून गेल्यावर संन्यास घेऊन श्रवण करावे' या आदेशाचे अनुसरण करता येणार नाही. मग ज्ञान कसे होणार व मोक्षही कसा मिळणार? ह्या आशंकेच्या समाधानासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. ते - कर्माचे निष्काम अनुष्ठान, शम, दम, तितिक्षा, श्रद्धा समाधान आणि उपरती ही ज्ञानाची प्रत्यक्ष साधने प्राप्त होईपर्यंत करीत राहावे. शमदमादि संपत्तीची जोड झाली की संन्यास घेऊन गीतेत सांगितलेल्या 'नैष्कर्म्यसिद्धी'ची प्राप्ती करून घ्यावी. (*'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति'।।१८:४९।।* इथे शमवान् ह्या शब्दाचा उपयोग, 'परसाधनांच्या प्राप्तीनंतर जसा कर्मत्याग केला तसा पुन्हां ज्ञानप्राप्तीनंतर शमदमादिक साधनांचा त्यागही करायचा का' या शंकेचे निरसन करण्यासाठी केला आहे. गीतेचेही असेच प्रतिपादन आहे. *'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते। योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते'।।६:३।।* शमदमादि ज्ञानसाधने जोवर अंगी बाणत नाहीत तोवर संन्यास हा पतनाचेच कारण होतो. 'कर्मही सोडले आणि ब्रह्मज्ञानही गंवसले नाही' असा हा उभयभ्रष्ट, अंत्यजाप्रमाणे त्याज्य आहे असे गरुडपुराणाचे (प्रेतखंड-धर्मकांडः ४९:६४) मत आहे. शमदमादि दैवी संपत्ती ज्याने कमावली त्याने कधीही - ब्रह्मचर्याश्रमांतून, गृहस्थाश्रमांतून वा वानप्रस्थाश्रमांतून संन्यास घ्यायला हरकत

नाही.

**अहं यथानुतिष्ठामि लोकस्तदनुगो भवेत् । नेदं साध्विति मत्वाऽजः कर्मयोगं जगौ प्रभुः ॥६॥**
**कर्मयोगमयं तस्य चेष्टितं शृणु सादरम् । यच्छ्रुत्वा भवसम्बन्धं छित्वा याति परं पदम् ॥७॥**

'यथा अहं अनुतिष्ठामि लोकः तत्+अनुगः भवेत्। इदं न साधु।' इति मत्वा अजः प्रभुः कर्मयोगं जगौ।६। तस्य कर्म+योग+मयं चेष्टितं सादरं शृणु, यत् श्रुत्वा भव+सम्बन्धं छित्वा परं पदं याति।७।

('*यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्*', जाबाल उ. ४). अन्यथा आजन्म निष्काम कर्मयोगाचे आचरण करावे. अशा प्रकारे पूर्वापर श्रुतींचा समन्वय होतो.४. कुणीही कसल्याही अवस्थेत अकर्मा होऊ शकत नाही; कारण तो प्रकृतीच्या गुणांनी विवश असतो. पण ज्ञानी पुरुषही कर्म करतांना दिसतात. त्या दोघांत काय भेद आहे? अज्ञ जन कर्माच्या फलाच्या आसक्तीने प्रेरित होऊन कर्म करतात; तर आत्मज्ञानी पुरुष फळाविषयी अनासक्त असतात. यावर असा आक्षेप येऊ शकतो की प्रयोजनाशिवाय अगदी मूर्ख प्राणीसुद्धा प्रवृत्त होत नाही. मग ज्ञानी पुरुष फलाच्या आसक्तीविना कसा कर्म करतो? या प्रश्नाचे उत्तर असे आहे की आत्मज्ञानी (विद्वान्) लोकसंग्रहासाठी कर्म आचरून दाखवितो.५.

'ज्ञान्यांचा विचार ठीक आहे, पण मग श्रीगुरूंना तसे करायची काय आवश्यकता?' तेच सांगतात, 'मी जसा आचार करीन त्याचेच अनुकरण लोक करतील. संन्यासधर्माला प्रतिकूल वर्तन - राजच्या भक्तीसाठी पालखीत बसणे इत्यादि केले तर इतरही लोक आपापल्या आश्रमाला निषिद्ध असे वागतील. असा संकर होणे हे कांही बरे नाही,' ह्या विचाराने श्रीगुरूंनी कर्मयोगाचा उपदेश केला आहे.६. त्या श्रीगुरूंची कर्मयोगाचा उजागर करणारी लीला श्रद्धापूर्वक ऐक; ही ऐकणारे संसाराचा संबंध छेदून परमपदाला पावतात.७.

**ब्रह्मध्रुग्यवनो राजा कश्चिद्धिंस्रोऽभवत्खलः । सदस्याहूय विप्रान्स स्वाग्रे वेदानपाठयत् ।।८।।**
**वेदान्पठन्ति ये सार्थास्तेभ्यो दास्ये धनं बहु । इत्याकर्ण्य तदुक्तं ये रैलुब्धास्ते तथाऽभजन् ।।९।।**
**श्रुत्वा खलोऽपि वेदार्थं द्विजाग्रे ब्राह्मणान्छ्रुतीः । अकुत्सयद्गवाशेन मिथ्याचारो मतोऽखिलः ।।१०।।**
**एवं सत्येकदा विप्रौ वैदिकावेत्य दुर्विधौ । मत्तौ तमूचतू राजन् वेदशास्त्रविदौ स्व इत् ।।११।।**

कश्चित् ब्रह्म+ध्रुक् खलः यवनः राजा अभवत्। सः विप्रान् सदसि आहूय स्व+अग्रे वेदान् अपाठयत्।८। ये वेदान् सार्थान् पठन्ति तेभ्यः बहु धनं दास्ये। इति आकर्ण्य ये रै+लुब्धाः ते तथा अभजन्।९। खलः अपि वेद+अर्थं श्रुत्वा, द्विज+अग्रे ब्राह्मणान्, श्रुतीः अकुत्सयत्। गवाशेन अखिलः मिथ्या+आचारः मतः।१०। एवं सति एकदां दुर्विधौ मत्तौ, वैदिकौ विप्रौ तम् एत्य ऊचतू, '(हे) राजन्, (आवां) वेद+शास्त्र+विदौ स्वः इत्।'११।

कुणी एक ब्राह्मणद्वेष्टा दुष्ट यवन जातीचा राजा त्या वेळी राज्य करीत होता. तो ब्राह्मणांना आपल्या दरबारात बोलावून आपल्यासमोर त्यांच्याकडून वेदांचे पठण करवीत असे.८. जे त्याच्यापुढे वेदांचे पठण करून अर्थही सांगत त्यांना तो भरपूर दक्षिणा देत असे. ही वार्ता ऐकून धनाचे लोभी असलेले ब्राह्मण त्याच्याकडे येत आणि वेदांचे सार्थ पठण करीत.९. तो दुष्टही वेदांचे अर्थ ऐकून, ब्राह्मणांपुढे सर्व वेदांची आणि यज्ञाचा शेष म्हणून मांस खाणाऱ्या ब्राह्मणांचीही निंदा करीत असे. सर्व मानवांचे देह मुखादि अवयवांनी सारखेच असतांना वर्णाश्रमाचे प्रतिपादन करणारा, दगडां-लाकडांसारख्या जड वस्तूंत, मूर्तीत आणि चित्रांत तसेच पिंपळादि झाडांतही दैवतांची कल्पना करणाऱ्या वैदिक धर्माच्या समग्र आचाराला तो गोभक्षक मिथ्या ठरवीत असे.१०. असा त्या राजाचा क्रम चालू असतां दोन आचारहीन आणि विद्येच्या मदाने उन्मत्त झालेले ब्राह्मण त्याच्याकडे आले आणि त्याला म्हणाले, 'राजेसाहेब! आम्ही चारही वेद आणि सहा शास्त्रांचे अध्ययन केलेले आहोत.११.

**अस्मत्तुल्यौ न कौ क्वापि त्वन्निघ्नाश्चेदिहानय । श्रुत्वेदं स्वाश्रितेभ्यो राट् शशंसोचुः खलं हि ते ।।१२।।**
**न यान्ति संमुखे केऽपि तयोस्तत्तौ समर्चय । राजाप्यानर्च तौ विप्रौ गजावारोह्य भूषितौ ।।१३।।**
**जैह्व्यौपस्थ्यसुखासक्ति-निदानेनेदृशी स्थितिः । वेदज्ञानामधःपात-शङ्कावर्जितचेतसाम् ।।१४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**विद्यापरिश्रमो वादं विना न सफलोऽस्ति नौ । तदाज्ञापय गच्छावो गां जेतुं विदुषो द्विजान् ।।१५।।**

कौ क्व अपि अस्मत्+तुल्यौ न । त्वत्+निघ्नाः चेत् इह आनय। इदं श्रुत्वा राट् स्व+आश्रितेभ्यः शशंस। ते हि खलं ऊचुः।१२। के अपि तयोः संमुखे न यान्ति। तत् तौ समर्चय। राजा अपि तौ विप्रौ गजौ आरुह्य भूषितौ आनर्च।१३। जैह्व्य+औपस्थ्य+सुख+आसक्ति+निदानेन अधःपात+शंका+वर्जित+चेतसां ईदृशी स्थितिः।१४। विप्रौ उचतुः। 'नौ विद्या+परिश्रमः वादं विना न सफलः। तत् विदुषः द्विजान् जेतुं गां गच्छावः। आज्ञापय।'१५।

'संपूर्ण भूमंडलावर आमच्यासारखे विद्वान् ब्राह्मण कुठेच नाहीत. तुझ्या पदरी असतील तर त्याना आमच्यासमोर वादासाठी आण!' ही त्यांची प्रौढी ऐकून राजाने आपल्या दरबारांतील ब्राह्मणांना विचारले. ते त्या दुष्टाला म्हणाले.१२. 'त्यांच्यासमोर कुणीही वादाला उभेही राहणार नाहीत. तेव्हां त्यांचाच आपण सत्कार करावा.' राजाने त्याप्रमाणे त्या ब्राह्मणद्वयांचा हत्तीवर बसवून, वस्त्रे भूषणे देऊन आदरसत्कार केला.१३.

रसना आणि लिंग यांच्या सुखांच्या आसक्तीने धनाच्याच मागे लागून वेदविक्रयादि दुष्कर्मे करतांना, वेदांचे अध्ययन करूनही, अधःपाताची शंकाही ज्याच्या मनाला शिवत नाही; 'काय तो हाच लोक आहे, परलोक म्हणून कांही नाहीच' असे मानणाऱ्या नास्तिकांची अशी स्थिती होते. यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाप्रमाणे (कठ उ. १:२:६) ते पुनः पुन्हां मृत्यूलाच वश होत राहतात. १४. ते ब्राह्मण राजाला म्हणाले, 'आम्ही कष्टाने संपादन केलेल्या वेदविद्येचे साफल्य वादाविना होणार नाही. तरी सर्व पृथ्वीवर पर्यटण करून विद्वान ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हाला आज्ञा द्या.'१५.

**स तथाप्यादिशद्विप्र-पराभवपरो नृपः । जयपत्रं द्विजान्जित्वा गृह्णन्तौ चेरतुर्भुवम् ।।१६।।**
**वावदूकतया मिथ्या द्विजांस्तर्जयतोः सदा । विवादं त्याजितैः प्राज्ञैर्जयोऽभूद्विशदस्तयोः ।।१७।।**
**त्रिविक्रमं त्रयीज्ञं तौ श्रुत्वागत्योचतुः कुरु । चेद्वेदज्ञोऽसि वादं नौ देहि वा जयपत्रमित् ।।१८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**वेदज्ञास्त्वादृशाः पूज्या द्विजौ नाहं तथाविधः । यतौ जयाजयसमे जिते किं वां भवेदिह ।।१९।।**

सः विप्र+पराभव+परः नृपः तथा आदिशत्। द्विजान् जित्वा जयपत्रं गृहणन्तौ भुवं चेरतुः।१६। प्राज्ञैः सदा विवादं त्याजितैः मिथ्या वावदूकतया द्विजान् तर्जयतोः, तयोः विशदः जयः अभूत्।१७। त्रिविक्रमं त्रयीज्ञं श्रुत्वा तौ (तं) आगत्य ऊचुः। 'चेत् वेदज्ञः असि वादं कुरु जयपत्रं इत् वा नौ देही।'१८। त्रिविक्रम उवाच। '(हे) द्विजौ, त्वादृशाः वेदज्ञाः पूज्याः। अहं न तथाविधः। जय+अजय+समे यतौ जिते वां इह किं भवेत्?'१९।

विप्रांचा पराभव करून वैदिक धर्माचा अधिक्षेप करण्यासाठी उत्सुक असलेल्या त्या राजाने त्या ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणे आज्ञापत्र दिले. तेही ब्राह्मणांशी वादविवाद करून त्यांना जिंकून जयपत्र घेत भूमीवर संचार करू लागले.१६. खरे विद्वान् कधीही वादविवाद करीत नसल्याने, वितंडवादाने आणि लटक्या युक्तिवादाने इतर ब्राह्मणांचा अधिक्षेप करण्याने त्या दोघांचा जिकडेतिकडे विजय होऊ लागला.१७. त्रिविक्रम यति हे तीनही वेदांचे जाणते आहेत अशी त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्याकडे जाऊन त्यांनी त्यांना वादाचे आह्वान दिले. म्हणाले, 'आमच्याशी वाद कर अथवा आम्हांला जयपत्र तरी दे!'१८. त्रिविक्रम म्हणाले, 'ब्राह्मण हो! आपल्यासारखे वेदांचे ज्ञानी सन्माननीय आहेत. मी त्यापैकी नाही.' इथे त्या ब्राह्मणांना **वेदज्ञ** असे संबोधन उपहासगर्भ आहे. मनुस्मृतीच्या वचनानुसार (६:८२) अध्यात्माच्या ज्ञानावांचून वेदांचे तत्त्व जाणतां येत नाही किंवा वैदिक कर्मांचे इष्ट फलही प्राप्त होत नाही. अध्यात्माचा गंधही नसणारे हे ब्राह्मण वेदज्ञ होऊंच शकत नाहीत. पुढे त्रिविक्रम भारती त्या ब्राह्मणांना म्हणाले, 'आम्हां संन्याशांना जय आणि पराजय दोन्ही सारखेच. तेव्हां अशा संन्याशाकडून जयपत्र घेण्यांत तुम्हांला काय हशील?'१९.

**पश्येमान्यमितानि त्वं पत्रं देहीति भाषितः । ताभ्यां दास्ये गुरोरग्र इत्युक्त्वा श्रीगुरुं ययौ ।।२०।।**
**तौ मत्तौ स्वासनारूढौ मूढौ तमनुजग्मतुः । मठे श्रीगुरुमासाद्य तमस्तौषीत् त्रिविक्रमः ।।२१।।**
**नम ॐकाररूपाय निर्गुणाय गुणात्मने । जगद्गुरो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत ।।२२।।**
**नाज्ञानान्धः परं वेत्ति यं घूक इव भास्करम् । स त्वं भो मत्तविप्रद्विड्-द्विजौ शासितुमर्हसि ।।२३।।**

'पश्य, इमानि अमितानि (जयपत्रानि), त्वं पत्रं देहि', इति भाषितः (त्रिविक्रमः), 'ताभ्यां गुरोः अग्रे दास्यामि', इति उक्त्वा श्रीगुरुं ययौ।२०। तौ मत्तौ स्व+आसन+आरूढौ मूढौ तं अनुजग्मतुः। त्रिविक्रमः मठे श्रीगुरुं आसाद्य तं अस्तौषीत्।२१। 'नम ॐकार+रूपाय निर्गुणाय गुणात्मने, पर+आनन्द+मूर्ते नमः। हे जगद्गुरो, अच्युत, जय, जय।२२। यं परं अज्ञान+अंधः, घूक इव भास्करं न वेत्ति, सः त्वं भो मत्त+विप्र+द्विट्+द्विजौ शासितुं अर्हसि।'२३।

'ही पहा असंख्य जयपत्रे आम्ही मिळवली आहेत; तूं पण तसेच पत्र लिहून दे!', असा त्यांचा आग्रह पाहून, 'बरे तर, गुरूंच्या समोर देतो', असे बोलून त्रिविक्रम त्यांना घेऊन गाणगापूरला श्रीगुरूंच्याकडे गेला.२०. ते मदांध ब्राह्मण आपापल्या पालख्यांत बसून त्रिविक्रमाच्या मागे गेले. ह्या अशिष्ट वर्तनांतून त्यांनी आपले मूर्खत्वच प्रकट केले. त्रिविक्रमाने गाणगापूरच्या मठांत येऊन श्रीगुरूंना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. २१. 'भगवंता, मायेच्या तीन गुणांनी नटलेल्या या प्रपंचाचा आपल्याशी कांही एक संबंध नाही; आपण आपल्या स्वाभाविक आनंदांतच निमग्न आहांत; द्वैत वा अद्वैत या दोन्हींच्या पलीकडे आपण आहांत; काल, देश आणि वस्तू यांनी परिच्छिन्न नाहीत; स्वगत, सजातीय आणि विजातीय हे भेदही आपल्यांत नाहीत; निन्दा आणि स्तुती आपल्याला सारखीच आहेत; शत्रू आणि मित्र यांना एकरूपच आहांत; आपल्या सर्व इंद्रियांतून प्रसन्नता ओसंडते आहे; मुखावर स्मितहास्य विलसत आहे; निश्चिंत आणि कृतार्थ असे आपण सच्चिदानंदब्रह्मांत स्थिरावलेले आहांत; म्हणजेच आपण ॐकारस्वरूप आहांत. आपल्याला नमस्कार असो!'२२.

**स्तुत्वैवमादितः सर्वं शशंसागमकारणम् । तौ प्राह गुरुरप्याप्तौ साध्यमेतेन किं द्विजौ ।।२४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**राज्ञाज्ञप्तौ द्विजान्जेतुमावां विद्वत्तमौ भुवि । अत्रानीतावनेनोभौ भिक्षू किं वेदपारगौ ।।२५।।**

एवं स्तुत्वा सर्वं आगम+कारणं आदितः शशंस। गुरुः अपि तौ आप्तौ प्राह, 'द्विजौ, एतेन किं साध्यम्?'२४। विप्रौ ऊचतुः, 'राज्ञा आवां भुवि विद्वत्+तमौ द्विजान् जेतुं आज्ञप्तौ। अनेन (त्रिविक्रमेण) उभौ अत्र आनीतौ। (युवां) भिक्षू वेद+पारगौ किम्?' २५।

'तर तूं सगुणाला वंदन करतोस कां?' हा प्रश्न अपेक्षून निर्गुणाला नमस्कार केला आहे. 'मग असा निर्गुण मी शब्दाना कसा गंवसेन?' या प्रश्नाच्या उत्तरी, 'भक्तांवर कृपा करण्यासाठी सगुणरूप धारण केलेल्या आपणांस नमस्कार असो. या अवतारविग्रहांतही आपले सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व आणि सर्वशक्तित्व अस्खलित आहे म्हणून हे अच्युता, सर्व जगाच्या गुरो, निरुपाधिक, निरतिशय आनंद हीच आपली मूर्ती आहे; आमच्या मूर्तीसारखी प्रारब्धकर्मापासून झालेली नाही. भक्तांची मायेच्या आवरणशक्तीपासून सुटका करून विजयी हो, विजयी हो!' एवढे श्रीगुरूंचे सामर्थ्य आहे हे **अच्युत** या संबोधनांतून सूचित केले आहे. 'एवढा मी महान् असूनही लोक मला कसे ओळखत नाहीत?' हा प्रश्न अपेक्षून त्रिविक्रम सांगतात, अज्ञानाने आंधळे झालेले लोक, दिवांधाने सूर्याला पाहूं नये तसे परम ज्योतिस्वरूप ज्ञानप्रदीप आपणांस जाणत नाहीत.'. यावर श्रीगुरूंनी 'तें असूं दे आत्तां तुझ्या येण्याचे काय प्रयोजन आहे?' असे विचारल्यावर त्रिविक्रम म्हणतात, 'हे विद्येच्या मदाने मस्त होऊन गावोगांव ब्राह्मणांचा अधिक्षेप करणारे - त्यांचा द्वेष करणारे, दोघे ब्राह्मण आले आहेत. त्यांना आपणच शासन करूं शकतां.'२३. अशा प्रकारे स्तुती करून त्रिविक्रमाने आपल्या येण्याचे कारण सविस्तर निवेदन केले. तेव्हां श्रीगुरू त्या तिथे आलेल्या दोघा ब्राह्मणांना म्हणाले, 'ह्या व्यर्थ ब्रह्मद्वेषाने तुम्ही काय साधणार आहांत?'२४. ते ब्राह्मण म्हणाले, 'आम्ही सर्वश्रेष्ठ विद्वान् असून पृथ्वीवरील सर्व ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हांला राजाने आज्ञा केली आहे. ह्या त्रिविक्रमाला आम्ही जयपत्र मागितले असतां तो आम्हांला इथे घेऊन आला आहे. तुम्ही दोघे संन्यासी काय वेद जाणाल?'२५.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गर्वेणैव प्रणष्टाः स्यू राक्षसा असुरा द्विजौ । अनादीन्कृत्स्नशोऽनन्तान्कोऽपि वेदान्न वेद रे ।।२६।।**
**ब्रह्मचर्याश्रमे वेदान्पठितुं प्राक्तपोऽतपत् । भरद्वाजो विधिः प्रीतस्तस्मै वेदानदर्शयत् ।।२७।।**
**दृष्ट्वा भास्वद्वेदराशीन् शङ्कितोऽभूदृषिर्ददौ । त्रीन्मुष्टीनृषयेऽद्यापि पठ्यमानो न पारगः ।।२८।।**

श्रीगुरुः उवाच। (हे) द्विजौ, असुरा, राक्षसा गर्वेण एव प्रणष्टा स्यू। अनादीन् अनन्तान् वेदान् कृत्स्नशः कः अपि न वेद, रे!२६। प्राक् भरद्वाजः ब्रह्मचर्य+आश्रमे वेदान् पठितुं तपः अतपत्। प्रीतः विधिः तस्मै वेदान् अदर्शयत्।२७। भास्वत् वेदराशीन् दृष्ट्वा ऋषिः शंकितः अभूत्। (ब्रह्मा) ऋषये त्रीन् मुष्टीन् ददौ। (सः) अद्य अपि पठ्यमानः, न पारगः।२८।

श्रीगुरूंनी त्या ब्राह्मणांची गर्वोक्ति ऐकून त्यांना समजाविले की, 'अरे ब्राह्मणांनो, बली, बाण इत्यादि असुर तसेच रावणादि राक्षस हे गर्वानेच नष्ट झाले! अपौरुषेय - म्हणजे कुणाही व्यक्तीने न रचलेले म्हणून अनादि असलेले आणि अनंत असलेले वेद पूर्णतः कुणीच जाणले नाहीत.' इथे कुणी बृहस्पतींच्या वचनानुसार वेदांचे कर्ते सगळे मुनि, भाण्ड, निशाचर होते (सर्वदर्शनसंग्रह - चार्वाकदर्शनपरिचय) असे म्हणतील तर ते मत शास्त्रविरुद्ध आहे. बृहदारण्यक उपनिषदानुसार (२:४:१०) ऋक्, साम, यजुः व अथर्व वेद हे परब्रह्माची निःश्वसिते (उच्छ्वास) आहेत. कृ. यजुर्वेदांत (३:८:११:४) वेद अनंत असल्याचे प्रतिपादन आहे.२६. पूर्वी भरद्वाज ऋषींनी वेद शिकण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमांत तप केले. ब्रह्मदेवांनी प्रसन्न होऊन त्यांना सर्व वेदांचे दर्शन घडविले.२७. वेदांच्या त्या तेजस्वी पर्वतप्राय राशींकडे पाहून भरद्वाजाच्या मनांत 'आपल्याकडून इतके सर्व वेदांचे अध्ययन कसे पार पडेल?' अशी शंका आली. तेव्हां ब्रह्मदेवांनी त्याला त्या वेदांच्या राशींतील आपल्या हाताने केवळ तीन मुठी काढून पुस्तकरूपाने दिल्या. आजवर भरद्वाज मुनि त्यांचे पठण करीत आहेत; पण त्यांचाही अभ्यास पूर्ण झालेला नाही.२८.

**पैलो वैशम्पायनश्च जैमिनिश्च सुमन्तुकः । ऋग्यजुःसामाथर्वाख्या अशिक्षन्त श्रुतीः क्रमात् ।।२९।।**
**गुरुर्व्यासो हरिः साक्षात्ततोऽत्र प्रसृता श्रुतिः । पठिताः कतिचिद्वेदा आयुष्मद्भिर्युगान्तरे ।।३०।।**
**शाखयैवाल्पायुषोऽत्र मन्दा वेदज्ञमानिनः । प्रतिग्रहपरान्नस्त्री-सक्ताः सिद्धिविवर्जिताः ।।३१।।**
**व्यासेनोक्ताश्चतुर्वेदाः शाखाङ्गोपाङ्गसंयुताः । आयुर्वेदस्ततो रुग्हृदृग्वेदस्योपवेद उत् ।।३२।।**
**स्वर्णोऽत्रिगोत्रजो गायत्रच्छन्दो ब्राह्मदैवतः । द्व्यरत्निमात्रो दीर्घाक्ष ऋग्वेदो व्यक्तकन्धरः ।।३३।।**

पैलः, वैशयम्पायनः च जैमिनिः च सुमन्तुकः क्रमात् ऋक्+यजुः+साम+अथर्व+आख्या श्रुतीः अशिक्षन्तः।२९। गुरुः व्यासः साक्षात् हरिः। ततः अत्र श्रुतिः प्रसृता। युगान्तरे आयुः+मत्+भिः कतिचित् वेदाः पठिताः।३०। 'अत्र मन्दा अल्पायुषः शाखया एव वेदज्ञमानिनः प्रतिग्रह+पर+अन्न+स्त्री+सक्ताः सिद्धि+विवर्जिताः।'३१। व्यासेन शाखा+अङ्ग+उपाङ्ग+संयुताः चतुः वेदाः उक्ताः। रुक्+हृत् आयुर्वेदः ऋग्वेदस्य उत् उपवेद ततः ।३२। ऋग्वेदः सु+अर्णः अत्रि+गोत्रजः, गायत्र+छन्दः, ब्राह्म+दैवतः, द्वि+अरत्नि+मात्रः, दीर्घाक्षः, व्यक्त+कंधरः।३३।

पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमन्तु ह्या चार शिष्यांनी अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद ह्या चार श्रुतींचे शिक्षण घेतले.२९. त्यांचे गुरू व्यासमुनि हे साक्षात् विष्णूचा अवतार होते. ह्या काळांत (कलियुगांत) त्यांच्यापासूनच वेदांचा प्रसार झाला. कृतादि पूर्वींच्या युगी दीर्घयुषी मुनींनी कांही कांही वेदांचे अध्ययन केले.३०. 'ह्या कलियुगांत मात्र अल्पायुषी, अल्पबुद्धी ब्राह्मण एखाद्या शाखेच्या अध्ययनानेच स्वतःला वेदज्ञ मानतात. तसेच प्रतिग्रह (दान घेणे) परान्न आणि परस्त्री यांच्या ठिकाणी आसक्त असतात. त्यामुळे ते वेदमंत्रांच्या सिद्धीपासून वंचितच राहतात.'३१. आश्वलायनादि शाखा, शिक्षा, कल्प, छंद, व्याकरण, निरुक्त आणि ज्योतिष ही अंगे तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा आणि वेदांत ही उपांगे यांच्यासहित व्यासांनी चार वेदांचे निरूपण केले आहे.

**ऋग्वेद -** त्यांत पहिला ऋग्वेद. रोगनाशक आयुर्वेद हा त्याचा उत्कृष्ट उपवेद विस्तारलेला आहे.३२. हा ऋग्वेद सुंदर अक्षरांचा, किंवा सुवर्णाच्या रंगाचा; अत्रिगोत्रोत्पन्न; गायत्र्यादि छंदांनी सुबद्ध आहे. ह्याचे **दैवत** ब्रह्मा आहे. ह्याच्या ध्यानाची दोन हात उंच, विशाल नेत्रांची आणि रुंद खांद्याची आहे.३३.

**शाकला बाष्कला तस्याः सांख्यायन्याश्वलायनि । माण्डूक्येत्थं पञ्च शाखा अष्टौ विकृतयस्त्वृचः ।।३४।।**
**निरुक्तं व्याकृतिर्ज्योतिश्छन्दः शिक्षा च कल्पकः । अस्येमानि षडङ्गानि वेत्तीमं कोऽद्य कृत्स्नशः ।।३५।।**
**पञ्चारत्निमितोऽर्काभः कपाली कृशदीर्घकः । यजुर्वेदो धनुर्वेदः क्षत्रेष्टोऽस्योपवेद उत् ।।३६।।**
**त्रिष्टुप्छन्दो भरद्वाज-गोत्रजो विष्णुदैवतः । षडशीतिभिदोऽङ्गानि प्राग्वदाष्टादशास्य तु ।।३७।।**
**परिशिष्टान्युपाङ्गानि षडेवैष इयान् ततः । क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी तृतीयकः ।।३८।।**

तस्यः शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि मांडूक्य इत्थं पञ्च शाखा। ऋचः अष्टौ विकृतयः।३४। अस्य निरुक्तं, व्याकृतिः, ज्योतिः, छंदः, शिक्षा च कल्पकः इमानि षड्+अङ्गानि। अद्य इमं कृत्स्नशः कः वेत्ति?३५। यजुर्वेदः पञ्च+अरत्नि+मितः अर्काभः कृश+दीर्घकः। उत क्षत्र+इष्टः धनुर्वेदः अस्य उपवेदः।३६। त्रिष्टुप्+छंदः भरद्वाज+गोत्रजः विष्णुदैवतः षड्+अशीति+भिदः, अस्य अङ्गानि पूर्ववत्, तु अष्टादश (परिशिष्टानि),।३७। उपाङ्गानि षट् एव। इयान् (यजुर्वेदः) ततः। तृतीयकः क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी।३८।

ऋग्वेदाच्या शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि आणि मांडूक्य अशा पांच **शाखा** आहेत; आणि जटा, माला, शिखा, लेखा, ध्वज, दण्ड, रथ, घन अशा आठ **विकृती** आहेत.३४. निरुक्ती, व्याकरण, ज्योतिष्, छंद, कल्प आणि शिक्षा ही या ऋग्वेदाची सहा **अंगे** आहेत. आजच्या काळांत ह्याला पूर्णपणे कोण जाणतो? अर्थात् कुणीही नाही.३५.

**यजुर्वेद -** आतां यजुर्वेदाविषयी सांगतात. हा पांच हात उंचीचा, सूर्यसंकाश, कृश आणि उंच आहे. तसेच क्षत्रियांना प्रिय असलेला धनुर्वेद याचा **उपवेद** आहे.३६. ह्याचा त्रिष्टुप् **छंद** आहे, **गोत्र** भरद्वाज आहे आणि **दैवत** विष्णु आहे. ह्याचे शाऐंशी **भेद** असून ह्याला अठरा **परिशिष्टे** आहेत.३७. याचीही उ**पांगे** सहाच आहेत. असा ह्या यजुर्वेदाचा विस्तार आहे.३८.

**षडरत्निमितोऽस्योप-वेदो गान्धर्वसंज्ञकः । रुद्राधिदेवो जगतीच्छन्दः काश्यपगोत्रजः ॥३९॥**
**हता नष्टाश्चापि शिष्टा नवाष्टौ च भिदोऽस्य तु । सामाङ्गोपाङ्गभेदेन कः पुमान्वेदितुं क्षमः ॥४०॥**
**चण्डस्तीक्ष्णोऽसितः काम-रूपी क्षुद्रक्रियोऽशुभः । स्वदारातुष्टोऽथर्वाख्यः शस्त्रास्त्रोपाङ्गवेद उत् ॥४१॥**

षड+अरत्नि+मितः। अस्य उपवेदः गान्धर्वसंज्ञकः। अधिदेवः रुद्रः। जगती छन्दः काश्यपगोत्रजः।३९। अस्य तु भिदः हता नष्टाः च अपि तु नव+अष्टौ शिष्टाः। साम अङ्ग+उपाङ्ग+भेदेन वेदितुं पुमान् क्षमः किम्?४०। अथर्वाख्यः चण्डः, तीक्ष्णः, असितः, कामरूपी, क्षुद्रक्रियः अशुभः स्व+दारा+तुष्टः शस्त्रास्त्र+उपाङ्ग+वेदः।४१।

**सामवेद -** तिसरा सामवेद क्षमाशील, निग्रही, शुचि, नित्य हार घालणारा, ढाल व काठी घेतलेला, सहा हात उंच आहे. याचा **उपवेद** गांधर्ववेद (संगीत) आहे. सामवेदाची **देवता** रुद्र, **छंद** जगती आणि **गोत्र** काश्यप आहे.३९. ह्याचा सहस्रावधी शाखांतून कित्येक इंद्राने चोरल्या तर कांही कालौघांत नाश पावल्या. तरीही आसुरायणी, वार्तान्तवेया, वासुरायणी, प्राञ्जली, ऋग्वेनविधा, प्राचीनयोग्या, ज्ञानयोग्या आणि राणायनी आठ शाखा शेष आहेत. त्यांतील राणायनीच्या आणखी नऊ शाखा आहेत. त्या अशा - राणायनीया, शाट्यायनीया, शाट्या, मुद्गला, खल्वला, महाखल्वला, लाङ्गला, कौथुमा, गौतमा आणि जैमिनीया.४०.

**अथर्ववेद -** चौथा अथर्व नांवाचा वेद चण्ड व तीक्ष्ण (अभिचारादि प्रयोगांचा प्रवर्तक), इच्छेला येईल ते रूप धारण करणारा, वशीकरणादि ऐहिक फल देणाऱ्या क्षुद्र क्रियांचा प्रवर्तक आणि स्वपत्नीत संतुष्ट आहे. अभिचार आणि वशीकरणादि प्रयोगांमुळे हा पतनाला कारण होतो म्हणून याला अशुभ म्हटले असले तरी ईश्वरप्रीतीसाठी ह्याचे सेवन केले तर तो शुभद मोक्षदायी होतो. किंवा याची उपनिषदे प्रश्न, मुंडक आणि मांडूक्य ही मोक्षप्रद आहेत आणि मोक्षानंतर शुभ राहत नाही असा अशुभ. याला तैत्तिराय उपनिषदांत पुच्छाबरोबरच प्रतिष्ठा असेही म्हटले आहे.४१.

**बैजानगोत्रजोऽनुष्टुप्छन्दा एषैन्द्रदैवतः । नवास्य भेदाः संपूर्णाः कल्पाः पञ्चात्र वेत्ति कः ।।४२।।**
**वर्षेऽद्य भारते कर्म-भ्रष्टा हीना द्विजातयः । वेदान्क्रीणन्त्यन्त्यजाग्रे सत्त्वहीना अतोऽभवन् ।।४३।।**
**उत्सृष्टोपाकृताभ्यस्त-गुप्तवेदमनुर्भुविः । किं न दास्यति विप्रेभ्यः प्रत्येकः कामधेनुवत् ।।४४।।**
**देवाधीनं जगन्मन्त्र-निघ्ना देवास्तु मन्त्रकाः । ब्रह्माधीना ब्राह्मणा मे देवता विष्णुरब्रवीत् ।।४५।।**

एष बैजानगोत्रजः, अनुष्टुप्+छन्दा, ऐन्द्र+दैवतः। अस्य भेदा नवा, कल्पाः पञ्च, कः संपूर्णाः वेत्ति?४२। अद्य भारते वर्षे कर्मभ्रष्टा हीना द्विजातयः अन्त्यज+अग्रे वेदान् क्रीणन्ति अतः सत्त्व+हीना अभवन्।४३। देवाधीनं जगत्, देवाः तु मंत्र+निघ्नाः, मन्त्रकाः ब्रह्म+अधीना, ब्राह्मणा मे देवता विष्णुः अब्रवीत्।४४। उत्सृष्ट+उपाकृत+अभ्यस्त+गुप्त+ वेद+मनुः प्रत्येकः विप्रेभ्यः भुवि कामधेनुवत् किं न दास्यति?४५।

हा अथर्ववेद **बैजानगोत्री** आहे; याचा **छंद** अनुष्टुप् आहे; आणि **देवता** इन्द्र आहे. याच्या पैप्पला, प्रथमा, दांता, प्रदांता, आख्याता, स्तौता, ख्याता, ब्रह्मदावला आणि शौनकेया अशा नऊ **शाखा** असून याला विधान, नक्षत्र, संहिता, शांती आणि विधिविधान असे पांच **कल्प** आहेत. या सर्वांचे संपूर्ण ज्ञान कुणाला बरे होऊं शकेल?४२.

आज ह्या भरतवर्षांत ब्राह्मणांनी आचार सोडल्यामुळे ते हीन झाले आहेत; अंत्यजांपुढे वेदाचा विक्रय करतात आणि त्यामुळे त्यांचे मंत्रसामर्थ्य लुप्त झाले आहे. ते केवळ मंत्राचे अक्षरधारी झाले आहेत.४३. शिक्षा या वेदांगाला अनुसरून (*'सुतीर्थादागतं व्यक्तं स्वाम्नाय्यं सुव्यवस्थितम्। सुस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते।।'* पाणिनीय शिक्षा ५१) मौखिक परंपरेने शिकलेला, उत्सर्जन आणि उपाक्रमाने टिकविलेला आणि भोजनादि नियमपालनाने आणि स्त्रीशूद्रादिकांच्या संपर्कापासून राखलेला एकेक वेदमंत्रसुद्धा ब्राह्मणाला काय देऊं शकणार नाही? सर्व कांही देईल. या भूमीवर तो कामधेनूसमानच आहे. एका मंत्राचे हे सामर्थ्य आहे. मग संपूर्ण वेदाचे सामर्थ्य केवढे असेल?४४. जग देवतांच्या अधिष्ठानावर टिकून आहे. ऋग्वेदाच्या प्रतिपादनानुसार (१:४०:५) देवता मंत्रामध्ये अवस्थित आहेत. त्या मंत्रांच्या उच्चाराचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे. ते ब्राह्मण माझे दैवत आहेत असे साक्षात् विष्णू म्हणाले आहेत.४५.

**सर्वस्वदक्षिणा भूपैर्दत्तापि ब्राह्मणैः पुरा । नात्ता कृतोऽद्रिस्तृणवत् सुसत्त्वाच्चाद्रिवत्तृणम् ।।४६।।**
**वशसर्वामरास्तेऽपि तदा स्वल्पज्ञमानिनः । युवां भ्रष्टौ भ्रष्टमन्त्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ ।।४७।।**
**आत्मस्तुतिपरौ ब्रह्म-द्विषौ साध्वात्मवञ्चकौ । त्वत्तुल्या ये पुरा जाता जातास्ते ब्रह्मराक्षसाः ।।४८।।**

'पुरा भूपैः सर्वस्व+दक्षिणा दत्ता अपि ब्राह्मणैः न अत्ता। सुसत्त्वात् अद्रिवत् तृणं, अद्रिः तृणवत्, च कृतः।४६। तदा वश+सर्व+अमरा अपि ते स्वल्पज्ञ+मानिनः। युवां भ्रष्टौ, भ्रष्ट+मंत्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ।४७। आत्म+स्तुति+परौ, ब्रह्म+द्विषौ साधु+आत्म+वंचकौ। पुरा ये त्वत्+तुल्या जाता ते ब्रह्मराक्षसाः जाताः।'४८।

'पूर्वीच्या काळी राजे-महाराजांनी सर्वस्वाचीही दक्षिणा देऊ केली असता ती ब्राह्मणांनी स्वीकारली नाही. कारण प्रतिग्रह हा तपाच्या तेजाचा नाशक असतो. त्यामुळे त्यांच्या मंत्रांत उत्कृष्ट सामर्थ्य होते. त्यामुळे ते गवताच्या काडीचाही पर्वत करीत तर पर्वताला कस्पटासमान करीत.'४६. तैत्तिरीय आरण्यकांत (२:१५) सांगितल्याप्रमाणे अशा त्या वेदवित् ब्राह्मणांच्या ठिकाणी जेवढ्या कांही देवता आहेत त्या वास करतात. असे सर्व देवतांवर प्रभुत्व असलेले ते ब्राह्मणसुद्धां स्वतःला स्वल्पज्ञच मानीत असत. त्यांना कसलाही गर्व किंवा मत्सर नव्हता. त्या गर्विष्ठ ब्राह्मणांना श्रीगुरू म्हणतात, 'तुम्ही मात्र आचारभ्रष्ट, जातिभ्रष्ट आणि मंत्रभ्रष्ट असून थोडक्याच वेदाभ्यासाने स्वतःला विद्वान् समजता. आपली आपणच स्तुती करता, आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठी ब्राह्मणांचा द्रोह करता आणि आपल्या सरलस्वभावी आत्म्याचीही वंचना करता! पूर्वी जे तुमच्यासारखे झाले त्यांना ब्रह्मराक्षसाच्या योनीत जावे लागले.'४७-४८.

॥ विप्रावूचतुः ॥

**नैतावच्छ्रोतुमाप्तौ स्वो विवादं कुरु चेन्न वाम् । तच्छक्तिर्जयपत्रं नौ युवाभ्यां दीयतामिति ॥४९॥**
**तथेत्युक्त्वोद्वीक्ष्य यान्तमानयित्वान्त्यजं प्रभुः । लेखा उल्लिख्य सप्ताभ्युत्क्रामयन्तमवाचयत् ॥५०॥**
**प्राचीनसप्तजन्मज्ञो रेखास्पर्शनतोऽभवत् । आद्यां गत्वास्मि बुरडो मातंग इति भाषितम् ॥५१॥**
**द्वितीयां तु किरातोत्थो रावणाख्य इतीरितम् । तृतीयां च नदीतीरस्थो गाङ्गेय इतीरितम् ॥५२॥**

विप्रौ ऊचतुः। 'एतावत् श्रोतुं न आप्तौ स्वः। विवादं कुरु। वां तत्+शक्तिः न चेत् युवाभ्यां नौ जयपत्रम दीयताम्।' इति।४९। प्रभुः 'तथा' इति उक्त्वा यान्तं अन्त्यजं आनयित्वा, सप्ता लेखा उल्लिख्य उत्क्रामयन्तम् अवाचयत्।५०। रेखा+स्पर्शनतः (सः) प्राचीन+सप्त+जन्म+ज्ञः अभवत्। आद्यां गत्वा 'मातंगः बुरुडः अस्मि' इति भाषितम्।५१। द्वितीयां तु 'किरातोत्थः रावणाख्यः' इति ईरितम्। तृतीयां च 'नदी+तीरस्थः गाङ्गेयः' इति ईरितम्।५२।

यावर ते ब्राह्मण म्हणाले, 'हे सगळे ऐकून घ्यायला आम्ही इथे आलो नाही. तुमच्यांत सामर्थ्य असेल तर आमच्याशी वाद करा. अन्यथा तुम्ही दोघे आम्हांला जयपत्र लिहून द्या.'४९. श्रीगुरूंनी 'ठीक तर,' असे म्हणून वाटेवरून जाणाऱ्या एका अंत्यजाला बोलावून घेतले. त्याच्यासमोर जमिनीवर सात रेघा काढून त्याला एकेक रेघ ओलांडायला लावली. प्रत्येक रेघ ओलांडून त्याला त्याची ओळख विचारली.५०. क्रमशः त्या रेघांना स्पर्श करताच त्याला त्या त्या पूर्वजन्माचे ज्ञान झाले. अशा रीतीने सध्याचा जन्म धरून त्याला सात जन्मांचे स्मरण झाले. पहिल्या रेघेवर येतांच तो 'मी मांग असून बुरुडाचा व्यवसाय करतो' असे म्हणाला.५१. दुसऱ्या रेघेशी येतांच तो 'आपण भिल्ल जातीचे असून आपले नांव रावण' असे सांगू लागला. तिसऱ्या रेघेवर तो स्वतःला 'नदीकाठचा कोळी' असल्याचे बोलू लागला.५२.

**चतुर्थीं वै कृषिपटुः शूद्रोऽस्मीत्यभिभाषितम् । पञ्चमीं सोमदत्ताख्यो वैश्योऽस्मीत्युदितं ततः ।।५३।।**
**षष्ठीं गोवर्धनाख्योऽहं क्षत्रः शूर इतीरितम् । सप्तमीं वेदशास्त्रज्ञो ब्राह्मणोऽस्मीति भाषितम् ।।५४।।**
**तदास्य मन्त्रितं भस्म क्षिप्त्वाङ्गे प्रभुराह तम् । चेद्वेदज्ञोऽसि विप्रौ द्राग्विवादेन पराजहि ।।५५।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तौ प्रत्याहितधियौ भिया । कम्पितौ श्रीगुरुं गत्वा विप्रौ शरणमूचतुः ।।५६।।**
**ब्रह्मद्विषौ स्वः पापिष्ठौ दुष्टसङ्गाहितभ्रमौ । मूढौ नौ दुर्गतिं यान्तौ समद्धर्तुं हरेऽर्हसि ।।५७।।**

चतुर्थीं वै 'कृषिपटुः शूद्रः अस्मि' इति अभिभाषितम्। पञ्चमीं 'सोमदत्ताख्यः वैश्यः अस्मि' इति उदितम्। ततः..।५३। षष्ठीं 'अहं गोवर्धनाख्यः शूरः क्षत्रियः' इति ईरितम्। सप्तमीं 'वेद+शास्त्र+ज्ञः ब्राह्मणः अस्मि' इति भाषितम्।५४। प्रभुः तदा अस्य अङ्गे मंत्रितं भस्म क्षिप्त्वा तं प्राह, 'चेत् वेदज्ञः असि, विप्रौ द्राक् विवादेन पराजहि।'५५। इति ईश+वाक्यं श्रुत्वा तौ भिया प्रत्याहत+धियौ कम्पितौ विप्रौ श्रीगुरुं शरणं गत्वा ऊचतुः।५६। (हे) हरे, नौ ब्रह्म+द्विषौ पापिष्ठौ, दुष्ट+संगा+हित+भ्रमौ मूढौ दुर्गतिं यान्तौ समुद्धर्तुं अर्हसि।५७।

चौथी रेषा ओलांडतांच तो स्वतःला 'शूद्र जातीचा शेतकरी' म्हणवू लागला तर पांचव्या रेषेजवळ 'सोमदत्त नांवाचा वैश्य' असल्याचे सांगूं लागला.५३. सहाव्या रेघेवर तो स्वतः 'गोवर्धन नांवाचा शूरवीर क्षत्रिय' असल्याचे सांगू लागला. शेवटची सातवी रेघ ओलांडतांच तो आपण 'वेदशास्त्र जाणणारे ब्राह्मण आहोत' असे म्हणाला.५४. श्रीदत्तप्रभूंनी त्या अंत्यजाच्या शरीरावर भस्म प्रोक्षण केले आणि त्याला म्हणाले, 'तूं वेदांचा जाणता आहेस ना? तर मग या दोघा ब्राह्मणांशी वाद करून त्यांचा पराभव कर!'५५. हे प्रभूंचे वचन ऐकून त्या ब्राह्मणांची भीतीने गाळण उडाली, बुद्धी काम करीना आणि ते थरथर कांपत श्रीगुरूंना शरण गेले आणि (खालीलप्रमाणे) बोलले.५६. 'पापताप हरणाऱ्या श्रीगुरो! आम्ही ब्रह्मद्वेषी, पापरत, कुसंगतीने मतिभ्रष्ट झालेले मूढ आहोत. आमचा नरकाच्या वाटेवरून उद्धार करा. तेच आपल्या ब्रीदाला शोभून दिसेल.५७.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**म्लेच्छाग्रे पठिता वेदा धिक्कृता ब्राह्मणा यतिः । तत्कर्मपरिपाकार्थं राक्षसौ द्राग्भविष्यथः ॥५८॥**
**सन्तप्तत्वादद्द्वादशाब्दानुषित्वा शान्तरूपतः । पठ्यमानानुवाकोप-देशाद्विप्राय वां गतिः ॥५९॥**
**इत्युक्तौ गुरुणा गत्वा भीमां स्नात्वा मृतावुभौ । राक्षसौ गुरुवाक्यात्तौ भूत्वा तत्रैव तस्थतुः ॥६०॥**
**तत्र यान्द्वादशाब्दान्ते द्विजो विस्मृतवान्मनुम् । तस्मै शशंसतुस्तं तौ तदा मुक्तौ स्वरीयतुः॥६१॥**

श्रीगुरुः उवाच। 'म्लेच्छ+अग्रे वेदा पठिता, ब्राह्मणा यतिः धिक्कृता। तत्+कर्म+परिपाक+अर्थं द्राक् राक्षसौ भविष्यथः।५८। संतप्तत्वात् शान्तरूपतः द्वादश+अब्दान् उषित्वा, विप्राय पठ्यमान+अनुवाक+उपदेशात् वां गतिः।'५९। इति गुरुणा उक्तौ भीमां गत्वा स्नात्वा उभौ मृतौ। गुरु+वाक्यात् तौ राक्षसौ भूत्वा तत्र एव तस्थतुः।६०। द्वादश+अब्द+अन्ते तत्र यान् द्विजः मनुं विस्मृतवान्। तौ तस्मै तं मंत्रं शशंसतुः। तदा मुक्तौ स्वः ईयतुः।६१।

श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'म्लेच्छ म्हणजे गोमांसभक्षक, धर्मविरुद्ध अति बोलणारा आणि कसलेही आचार न पाळणारा (बोधायनस्मृति). अशांच्या समोर तुम्ही वेदपठण केलेत; वेदांनी (कृ. यजु. तै. संहिता १:७:३:१) ज्यांना प्रत्यक्ष देवतास्वरूप मानले आहे आणि छांदोग्य उपनिषदांत ज्याची निन्दा करण्याला निषेध केला आहे अशा ब्राह्मणांचा धिक्कार तुम्ही केला आहे. संन्यासी हे साक्षात् गुरुस्वरूप आहेत. गुरुगीतेत (१०४) सांगितल्याप्रमाणे 'गुरूंचा अधिक्षेप करणारा आणि ब्राह्मणांना वादाने खाली पाहायला लावणारा निर्मनुष्य अरण्यांत राक्षस होतो.' या सर्व कर्मांच्या फलस्वरूप तुम्हांला तात्काळ ब्रह्मराक्षसांच्या योनीत जावे लागेल.५८ तुम्हांला आत्तां झालेल्या पश्चात्तापामुळे, तुम्ही बारा वर्षे शांत अवस्थेत राहाल. त्यानंतर एका ब्राह्मणाला त्याला न आठवणारा यजुर्वेदांतला अनुवाक सांगण्याने तुम्ही त्या राक्षसयोनीतून मुक्त व्हाल.' इथे उपदेश शब्द योजला असला तरी लाक्षणिक अर्थ 'सांगणे' असाच ग्राह्य आहे.५९. असा श्रीगुरूंचा निरोप मिळतांच ते उभयतां भीमेच्या तीरावर गेले. तिथे स्नान करतांच ते मरण पावले आणि ब्रह्मराक्षस होऊन तिथेच एका झाडावर राहिले.६०. बारा वर्षांनी तिथून जाणाऱ्या एका ब्राह्मणाला मंत्राचे विस्मरण झाले. त्याला त्यांनी तो मंत्र सांगतांच ते राक्षस मुक्त होऊन स्वर्गलोकाला गेले.६१.

**स्वधर्ममुत्सृज्य मदेन ये द्विजान् गुरून्द्विषन्तः खलु राक्षसा वने ।**
**भवन्ति पापोऽपि यदानुतापितः कनिष्ठशिक्षो भवति द्विजाविव ।।६२।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे वेदोपदेशो नाम प्रथमोऽध्यायः ।।१।।**

**आदितश्चतुर्दशोऽध्यायः ।।१४।।**

**सप्ताहपारायणे तृतीयः। अन्ते रसज्ञा वशा.. स्तोत्रं पठनीयम् । अन्यदिने आरंभे गुरुस्तुतिः ।**

ये स्वधर्मं उत्सृज्य मदेन द्विजान् गुरून् द्विषन्तः (ते) खलु वने राक्षसा भवन्ति। पापः अपि यदा अनुतापितः द्विजौ इव कनिष्ठ+शिक्षो भवति।६२।

जे आपला धर्माचार टाकून मदांध होऊन ब्राह्मणांचा आणि गुरूचा द्वेष करतात ते नक्कीच अरण्यांत राक्षस होतात. पापी जरी असला तरी त्याला पश्चात्ताप झाला तर मात्र त्या ब्राह्मणासारखीच त्याची शिक्षा कमी होते.६२.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला पहिला आणि प्रथमपासून चौदावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पञ्चदशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पतितस्य ततो जातं किमु हीनोऽप्यनुग्रहात् । श्रीमद्भगवतो वेद-शास्त्रज्ञोऽस्मीति योऽब्रवीत् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**प्रसादात्सद्गुरोर्ज्ञानी भूत्वाह पतितो हरिम् । ब्राह्मणस्यापि मे कस्मादधःपातोऽभवद्धरे ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**कर्मणा भ्रममाणस्य यन्त्रवत्पुण्यपापतः । प्रकृत्यायत्तचेष्टस्य जन्तोरूर्ध्वमधोगती ।।३।।**

नामधारक उवाच। 'श्रीमद्भगवतः अनुग्रहात् यः वेद+शास्त्र+ज्ञः अस्मि इति अब्रवीत् (तस्य) पतितस्य उ ततो किं जातम्?'१। सिद्ध उवाच। 'सद्गुरोः प्रसादात् ज्ञानी भूत्वा पतितो हरिं आह, (हे) हरे, मे ब्राह्मणस्य अपि कस्मात् अधःपातः अभवत्?'२। श्रीगुरुः उवाच। कर्मणा यन्त्रवत् भ्रममाणस्य प्रकृति+आयत्त+चेष्टस्य जन्तोः पुण्य-पापतः ऊर्ध्वं+अधो+गतिः।३।

**श्रीगणेशाय नमः। अथ पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाक उपदेशुनी पंचादशीं अंत्यजाचे ज्ञान हरिले। यतीला प्रायश्चित्त तसे भस्ममाहात्म्य निरूपिले।।१।।** मागील अध्यायांत माझ्या वर्तनाला प्रमाण मानून लोक तसेच आचरण करतील, हे बरे नव्हे हा श्रीगुरूंचा विचार मांडून वेदांचा अवमान आणि ब्राह्मणांचा अधिक्षेप केल्याने ब्राह्मणाचाही कसा अधःपात होतो ते सांगितले. आता संवादरूपाने दुष्कर्माने दुर्गती तसेच प्रायश्चित्ताने संशुद्धी कशी होते ते सांगत आहेत.

नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, 'भगवान श्रीगुरूंच्या प्रसादाने अंत्यज असूनही 'मी वेदशास्त्रांचा जाणकार आहे' असे म्हणणाऱ्या त्या पतिताचे पुढे काय झाले?'१. सिद्धमुनी म्हणाले, सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने ज्ञानी झालेला तो अंत्यज पापहर सद्गुरूंना संबोधून म्हणाला, 'मी पूर्वजन्मी ब्राह्मण असूनही मला हा अंत्यजाचा जन्म कां आला?'२. श्रीगुरू त्याला सांगूं लागले. 'कर्माच्या चक्रावर यन्त्राप्रमाणे फिरत असलेल्या, प्रकृतीला अनुसरून विविध कर्मे करणाऱ्या जीवाची पुण्याने ऊर्ध्वगती आणि पापाने अधोगती होते.'३.

**गुरुमातापितृस्त्र्यर्भ-धर्माचारकुलेश्वरान् । यो जहाति मुधा सोऽपि जीवहिंस्रोऽनृतप्रियः ।।४।।**
**खलः कन्याश्वगोक्रेता गृहग्रामवनाग्निदः । त्यक्तश्राद्धः परान्नाशीः कालाप्तातिथिहापकः ।।५।।**
**सद्विप्रदेवतीर्थार्च्य-वेदशास्त्रादिनिन्दकः । तडागकूपारामाध्व-क्रतुध्वंसी व्रताहभुक् ।।६।।**
**श्राद्धार्च्याहाम्बुपर्वाह्नि-स्त्रीभुग्विश्वासघातकः । दत्तदानहरः स्वोक्त-व्यस्ताचारोऽन्यकर्मकृत् ।।७।।**

यो गुरु+माता+पितृ+स्त्री+अर्भ+धर्म+आचार+कुलेश्वरान् मुधा जहाति सः अपि जीव+हिंस्रः अनृत+प्रियः।४। खलः कन्या+अश्व+गो+क्रेता गृह+ग्राम+वन+अग्नि+दः त्यक्त+श्राद्धः परान्नाशीः काल+आप्त+अतिथि+हापकः।५। सत्+विप्र+देव+तीर्थ+अर्च्य+वेद+शास्त्र+आदि+निंदकः; तडाग+कूप+आराम+अध्व+क्रतु+ध्वंसी; व्रत+आह+भुक्; ।६। श्राद्ध+अर्चा+अहे अम्बु+पर्व+अह्नि स्त्रीभुक्; विश्वास+घातकः; दत्त+दान+हरः; स्व+उक्त+व्यस्त+आचारः; अन्य+कर्म+कृत्;।७।

इथे श्रीगुरू बुरुडाने विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरी चंडाल या नीचतम जातीत जन्म घेण्यास कारणीभूत कर्मे सांगत आहेत. गुरू, आई, वडील, पत्नी, (स्वतःचे) मूल, धर्माचे आचरण तसेच कुलदैवत यांचा, निष्कारण त्याग करणारा; जीवांची हिंसा करणारा; असत्य भाषण करणारा;४. दुष्ट माणूस; मुलगी, घोडा किंवा गाय यांना विकणारा; घराला, गांवाला किंवा वनाला आग लावणारा; श्राद्ध न करणारा; परान्नावर जगणारा; जेवणाच्या वेळी आलेल्या अतिथीला हाकलून देणारा;५. साधुसंत, ब्राह्मण, तीर्थ, पूज्य व्यक्ती, वेद, शास्त्र इत्यादींची निंदा करणारा; तलाव, विहीर, बाग, मार्ग, यज्ञ यांचा नाश करणारा;६. श्राद्धाच्या, एकादशी वगैरे व्रताच्या किंवा पूजेच्या दिवशी, पाण्यांत, दर्शादि पर्वकाळांत स्त्रीशी संभोग करणारा; विश्वासघातकी; दान दिलेली वस्तू परत घेणारा; एक बोलून दुसरेच करणारा; आपल्याला अधिकार नसलेले कर्म करणारा;७.

**स्वपुण्यपरपापास्यो दम्भाद्यैः सत्त्वदर्शकः । खलहिंस्रस्तेयिसङ्गी घातज्ञो जारणादिकृत् ।।८।।**
**ज्ञानं विना चिकित्साशी कर्मभ्रष्टोऽन्यतापकृत् । इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डालयोनिगाः ।।९।।**
**क्रोधी शूद्रीरतस्त्यक्तनित्यनैमित्तिकक्रियः । वृषगोवृषलीसक्तोरसगोवेदविक्रयी ।।१०।।**
**अदत्वेशं कपिलगोदुग्धपोऽतिनिषिद्धभुक् । प्रतिग्रही पराजीवजीवी सन्ध्याशयी कुवाक् ।।११।।**
**इत्याद्या ब्राह्मणास्तेऽपि पूर्ववत्संभवन्ति हि । जीवजातिमिताः सन्ति नरका एकविंशतिः ।।१२।।**

स्व+पुण्य+पर+पाप+आस्यः, दम्भ+आद्यैः सत्त्व+दर्शकः, खल+हिंस्र+स्तेयि+संगी, घातज्ञः, जारण+आदि+कृत्,।८। ज्ञानं विना चिकित्साआशीः, कर्मभ्रष्टः, अन्य+ताप+कृत् इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डाल+योनिगाः।९। क्रोधी, शूद्रीरत, त्यक्त+नित्य+नैमित्तिक+क्रियः वृषगः वृषली+सक्तः, रस+गो+वेद+विक्रयी,।१०। ईशं अदत्वा कपिल+गो+दुग्धपः, अतिनिषिद्ध+भुक्, प्रतिग्रही, पराजीव+जीवी, सन्ध्या+शयी कुवाक्।११। इत्याद्या ब्राह्मणाः ते अपि पूर्ववत् संभवन्ति हि। जीवजातिमिताः नरकाः सन्ति। (तेषु) एकविंशतिः।१२।

आपले पुण्य आणि दुसऱ्याचे पाप बोलून दाखविणारा; दंभ वगैरेनी आपल्या साधुत्वाची जाहिरात करणारा; दुष्ट, हिंसक, चोर यांच्या संगतीत असणारा; घातकी; जारण-मारणादि प्रयोग करणारा;८. वैद्यकाचे ज्ञान नसतांना औषधोपचार करून पैसे कमावणारा; आपल्या विहित कर्माचा त्याग करणारा; दुसऱ्यांना पीडा करणारा इत्यादि मृत्यूनंतर नरक भोगून चण्डाल योनीत जन्म घेतात.९. कोपिष्ट, शूद्रस्त्रीशी संग करणारा, नित्य व नैमित्तिक कर्मांचा त्याग करणारा, बैलावर बसणारा, कलावंतिणीवर आसक्त असलेला, विषारी पदार्थ, गाय किंवा वेद यांचा विक्रय करणारा,१०. कपिला गाईचे दूध ईश्वराला अर्पण न करता आपणच पिणारा, कांदा, लसूण इत्यादि अतिनिषिद्ध पदार्थ खाणारा, दुष्टाचे दान घेणारा, दुसऱ्याची उपजीविका हरण करणारा, संध्याकाळी झोपणारा, तोडात सतत शिवीगाळी असणारा,११. इत्यादि ब्राह्मणही वरीलप्रमाणेच नरक भोगून हीन जातीत जन्म घेतात. जीवांच्या योनीइतकेच म्हणजे ८४ लक्ष इतके नरक आहेत.१२.

**तेषु श्रेष्ठा जीवपापविपाका अन्तकालये । तेष्वन्तकः क्षिपत्येतान्पापिनः पापभुक्तये ।।१३।।**
**त्यक्त्वा पुष्टमपीह वर्ष्म कलुषी यान्यातनाङ्गेन तृट्- । क्षुच्छीतोष्णसुपीडितो यमचरैर्बद्धोऽयने दुर्गमे ।।**
**मूर्छन् तर्जनताडनादिभिरसन्वै वैतरिण्यर्दितो । भुङ्क्ते याम्यमवाप्यराष्ट्रमवशस्तां यातनां नारकीम् ।।१४।।**
**ततो योन्यन्तरे याति भुक्तदुःखोऽप्यघांशतः । प्रायशो वासनाभूम्नो भूतप्रेतपिशाचताम् ।।१५।।**

अन्तक+आलये तेषु (एकविंशति) श्रेष्ठाः जीव+पाप+विपाकाः। तेषु अन्तकः पापिनः पापभुक्तये क्षिपन्ति।१३। कलुषी इह पुष्टं अपि वर्ष्म त्यक्त्वा यातना+अङ्गेन यमचरैः बद्धः क्षुत्+शीत+उष्ण+सुपीडितः दुर्गमे अयने यान् असन् तर्जन+ताडनादिभिः मूर्छन् वै वैतरिणी अर्दितः अवशः याम्यं राष्ट्रं अवाप्य तां नारकीं यातनां भुङ्क्ते।१४। ततः भुक्त+दुःखः अपि अघ+अंशतः योनि+अंतरे याति। वासना+भूम्नः प्रायशः भूत+प्रेत+पिशाचतां (याति)।१५।

(पण त्यांतील २१...) जीवांच्या पापांचा परिपाक अशा त्या नरकांतील एकवीस मुख्य आहेत. यमाच्या नगरीत हे सर्व नरक आहेत. यमराज पापी लोकांना त्यांच्या पापाचा भोग देण्यासाठी यांत टाकतो.१३. मृत्यूनंतर पापी जीव आपला स्थूल देह कितीही पुष्ट असला तरी तो इथेच टाकून यातनादेह धारण करतो. यमदूत त्याच्या त्या यातनादेहाला बांधून, तहान, भूक, शीत, उष्ण इत्यादींनी तळमळत, दुर्गम आणि कठीण मार्गाने त्याला ठोकत, मारत, ओढून घेऊन जातात. वैतरिणी नदीतून असह्य कष्ट भोगीत तो पापी जीव विवश होऊन यमाच्या देशात पोचतो. आणि तिथे तो आपल्या पापाला अनुसरून भयंकर आणि अनिर्वाच्य नरकयातना भोगतो.१४. तिथे - यमलोकांत, यातना भोगल्यानंतर अवशिष्ट पापामुळे दुसऱ्या योनीत जन्म घेतो. ज्या जीवांच्या वासना प्रचुर आहेत त्यांना बहुधा भूत, प्रेत किंवा पिशाच योनीत जावे लागते.१५.

**हुंतुंकाराद्गुरोर्विप्राभिभवाद्ब्रह्मराक्षसः । गर्दभो हीनसेवी स्यात् कुक्कुटोऽतिथिहापकः ।।१६।।**
**उष्ट्रोऽर्थहृद्वनचरः फलपत्रार्थहृद्भवेत् । मधु दंशः पलं गृध्रोऽन्नमाखुश्चातको जलम् ।।१७।।**

गुरोः हुं-तुंकारात्, विप्र+अभिभवात् ब्रह्मराक्षसः, हीन+सेवी गर्दभः, अतिथि+हापकः कुक्कुटः स्यात्।१६। अर्थहृत् उष्ट्रः, फल+पत्र+अर्थ+हृत् वनचरः, मधु(हृत्) दंशः, पलं(हृत्वा) गृध्रः, अन्नं (हृत्वा) आखुः, जलं (हृत्वा) चातकः।१७।

**मृत्यूने सर्व कर्मांचा नाश होत नाही. -** एकाच कर्माची परस्परविरोधी अशा विविध योनीत भोगतां येणारी फळे आहेत, तसेच (ब्रह्महत्यादि) एकेका कर्मापासून वेगवेगळ्या अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो, असे शास्त्रवचन आहे. स्थावरादि योनीत गेलेल्या अत्यंत मूढ योनीतील जीवांना वरच्या योनीत जाण्याचे कर्म करतां येत नाही; गर्भावस्थेतच स्राव झालेल्या जीवांकडून कांहीही कर्म घडूंच शकत नाही. म्हणजे या सर्वांचे संसरणच थांबायला हवे. पण तसे होत नाही. त्यामुळे असे निश्चित होते की एकाच जन्मांत सर्वच कर्मांचा उपभोग होऊ शकत नाही. कांही लोक असे म्हणतात की 'मृत्यूच्या वेळी सर्व कर्मांच्या आधाराचा (वासनांचा) उपमर्द झाल्यावरच नव्या जन्माचा आरंभ होतो. त्यांच्या मते कांही कांही कर्मे (भावी जन्मांच्या) आरंभकत्वाने स्थिर राहतात व कांही जन्मांतराला कारणीभूत होतात हे सयुक्तिक नाही. 'मरण हे सर्व कर्मांना अभिव्यक्त करते, जसा दिवा आपल्या आसमंतांतील सर्व वस्तूंना अभिव्यक्त करतो. अर्थात् नवा जन्म आरंभ होतांनाच आधीच्या सर्व कर्मांचा नाश होतो.' हे मत खरे नाही. सर्वाच्या (इथे संपूर्ण कर्माशयाच्या) सर्वात्मकत्वामुळे, देश, काल आणि निमित्त यांच्या मर्यादांमुळे, सर्वात्मनाचा अंशतः उपमर्द किंवा कधी कांही अभिव्यक्ति असे होत नाही. तसेच कर्मांच्या आणि त्यांच्या आश्रयांच्या (वासना) विषयी आहे. पूर्व जन्मी अनुभवलेल्या मर्कट, मनुष्य, मोर इत्यादि जन्मांनी संस्कारित अशा अनेक वासना मर्कट जन्माला कारणीभूत कर्माने - मर्कट जन्माच्या आरंभाने नष्ट होत नाहीत तशीच अन्य जन्मांत प्राप्त झालेली कर्मेही नाश पावत नाहीत हे सयुक्तिकच आहे. मर्कट योनीत जन्म झाल्याने मागील सर्व जन्मांत अनुभवलेल्या वासनांचा नाश होतो असे मानले तर माकडाच्या

**गन्धान् छुच्छुन्दरी धान्यं शलभोऽलिर्विषं तथा । कृमिः कीटः पतङ्गः स्यात् स्वर्णं हृत्वा तृणं पशुः ॥१८॥**
**काको निर्मन्त्रभुग्गृध्रो मित्रध्रुग्दाम्भिको बकः । इत्याद्या बहुशो योनीर्भुक्त्वा रुग्णा भवन्त्यथ ॥१९॥**

गन्धान् (हृत्वा) छुच्छुंदरी, धान्यं शलभः, विषं अलिः, स्वर्णं हृत्वा कृमिः, कीटः, पतङ्गः, तृणं (हृत्वा) पशुः स्यात्।१८। निर्मन्त्र+भुक् काकः, मित्र+ध्रुक् गृध्रः, दाम्भिकः बकः (स्यात्)। इत्याद्या बहुशः योनीः भुक्त्वा अथ रुग्णा भवन्ति।१९।

एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडी मारण्याचे जन्मजात कौशल्य, तसेच आईच्या पोटाला चिकटून राहण्याचे कौशल्य त्याला कुठून आले? ह्या जन्मी तरी त्याचा त्याने अभ्यास केलेला नाही. तसेच या जन्माच्या आधीचा त्याचा जन्म मर्कटाचाच असेल असे सांगतां येत नाही. मृत्यूच्या वेळी 'जीव आपले ज्ञान, कर्म आणि पूर्वानुभव यांना घेऊन जातो' असे बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) म्हटले आहे. यावरून वासनांप्रमाणेच सर्व कर्मांचा उपमर्द होत नाही. ज्या अर्थी शेष कर्म आहे त्या अर्थी त्यापासून अन्यान्य योनीत जन्म घ्यावा लागणार अशी संसाराची उपपत्ती लागते.

गुरूंना 'हुं', 'तुं' इत्यादि अवमानकारक बोलल्याने आणि ब्राह्मणांचा पराभव करण्याने ब्रह्मराक्षसाचा, खालच्या जातीची सेवा करण्याने गाढवाचा तर अतिथीला हाकलणाऱ्यास कोंबड्याचा जन्म येतो.१६.

**चोरीची फळे -** कोणत्या पदार्थाची चोरी केल्याने कोणती योनी मिळते हे पुढे सांगत आहेत. द्रव्य चोरणारा उंट, फळे-पाने चोरणारा वानर, मध चोरणारा गांधिलमाशी, मांस चोरणारा गिधाड, अन्न चोरणारा उंदीर तर पाण्याची चोरी करणारा चातक होतो.१७. गंधचोर चिचुंद्री, धान्यचोर टोळ, विषचोर विंचू, सुवर्णचोर कृमी, कीट वा पतंग आणि गवत चोरणारा पशू होऊन जन्माला येतो.१८. आमंत्रण नसतांना (आगंतुक) जेवणारा कावळा, मित्रद्रोही गिधाड, दंभ करणारा बगळा होतात. अशा अनेक योनीत फिरून उरलेल्या पापांशाने तो इथे मनुष्यजन्मात रोगी होतो.१९.

**हृद्रोगी परहृद्भेत्ता गुरुत्यागी महामयी । क्षयी तु ब्रह्महा कुष्ठी स्वर्णहृत्पुस्तकापहा ।।२०।।**
**जन्मान्धो विश्वासघाती वमी गण्डी गणार्थहृत् । अपुत्रोऽन्यार्थहृद्वस्त्र-हृच्छ्वित्री चानृती कुवाक् ।।२१।।**
**गुल्म्यन्नहृत्कुरुड्मांस-भोक्ता क्वास्यस्तु तैलहृत् । पामी फलादिहृच्छ्वित्री कांस्यकार्पासलोहहृत् ।।२२।।**
**देवार्थहृत्पाण्डुरोगी रोगाः सर्वेऽत्र पापतः । परस्त्र्यालिङ्गनाज्जन्म शतं श्वा तद्भगेक्षकः ।।२३।।**
**अन्धो बन्धवङ्गनाभोगी गर्दभोऽहिश्च दुर्धिया । परस्त्र्यालिङ्गनान्नूनं हृद्रोगी ह्यष्टधा रतिः।।२४।।**

पर+हृद्+भेत्ता हृद्+रोगी, गुरु+त्यागी महामयी, ब्रह्महा तु क्षयी, स्वर्ण+हृत् कुष्ठी, पुस्तक+अपहा जन्मांधः,।२०। विश्वास+घाती वमी, गणार्थ+हृत् गण्डी, अन्य+अर्थ+हृत् अपुत्रः, वस्त्र+हृत् श्वित्री च अनृती कुवाक्।२१। अन्नहृत् गुल्मी, मांसभोक्ता कुरुक्, तैलहृत् तु कु+आस्यः, फलादिहृत् पामी, कांस्य+कार्पास+लोह+हृत् श्वित्री।२२। देवार्थहृत् पांडुरोगी, अत्र सर्वे रोगाः पापतः। पर+स्त्री+आलिंगनात् जन्म+शतं श्वा, तत्+भग+ईक्षकः अन्धः,।२३। बन्धु+अङ्गना+भोगी गर्दभः, पर+स्त्री+आलिंगनात् नूनं हृद्+रोगी हि अष्टधा रतिः।२४।

कुणाच्याही मर्मी लागेल असे बोलणाऱ्याला हृदयरोग होतो. गुरूचा त्याग करण्याने कुष्ठरोगी, ब्रह्महत्या करणारा क्षयी तर पुस्तक चोरणारा जन्मांध होतो.२०. विश्वासघातकी वांतिरोगी, सामूहिक द्रव्याचा अपहार करणारा गंडमाळारोगी, परद्रव्यापहारी निपुत्रिक, वस्त्रे चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२१. अन्न चोरणारा गुल्मरोगी (कर्करोगी), मांस खाणारा गलत्कुष्ठी, तेल चोरणारा वांकड्या तोंडाचा, फळे वगैरे चोरणारा त्वचारोगी (खरुज वगैरे), कांसे, कापूस किंवा लोखंड चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२२. देवस्वाचा अपहार करणारा पांडुरोगी होतो. ह्या मनुष्यदेहात सर्वच रोग पापापासून होतात.२३. **व्यभिचार -** आता व्यभिचारकर्माची फळे सांगतात. परस्त्रीला आलिंगन दिले तर तो शंभर जन्म कुत्रा होतो; तिची (परस्त्रीची) योनी पाहिली तर आंधळा होतो; बंधुभार्येशी संभोग करणारा गाढवजन्माला जातो; परस्त्रीला आलिंगन दिले तर हृदयविकार होतो. नुसत्या आलिंगनानेही कसे पाप लागते याचे स्पष्टीकरण म्हणून रतीचे (कामक्रीडेचे) आठ प्रकार असतात असे स्पष्ट केले आहे. स्मरण, कीर्तन, क्रीडा, प्रेक्षण, उत्साह, अध्यास आणि प्रत्यक्ष संभोग असे आठ मैथुनाचे प्रकार अग्निपुराणांत वर्णिले आहेत. (*'स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणं। उत्साहोऽध्यवसायच क्रियानिष्पत्तिरेव च'।।३१०:९-१०)*२४.

**श्वा मातुलसखिस्त्रीभुक् कृमिः स्यादौपपत्यतः । स्वैरिण्योऽपि स्त्रियः श्वादि-योनिं गत्वा व्यथन्त्यलम् ।।२५।।**
**इति संवादमाकर्ण्य गुरुं प्राह त्रिविक्रमः । ज्ञानाद्वाऽज्ञानतो जातं कथं पापं प्रणश्यति ।।२६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पश्चात्तापेन संशुद्धिः प्रायश्चित्तादिभिः पुनः । सदस्युच्चार्य पापं स्वं ब्रह्मदण्डं निधाय च ।।२७।।**
**सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृतपापानुसारतः । कृच्छ्राब्दादि चरेच्छक्त्याऽशक्तो गोऽर्घादिनाऽशठः।।२८।।**

मातुल+सखि+स्त्रीभुक् श्वा, औपपत्यतः कृमिः स्यात्। स्वैरिण्याः स्त्रिया अपि श्वादि योनिं गत्वा अलं व्यथन्ति।२५। इति संवादं आकर्ण्य त्रिविक्रमः गुरुं प्राह, ज्ञानात् वा अज्ञानता जातं पापं कथं प्रणश्यति?२६। श्रीगुरुः उवाच। 'पश्चात्तापेन, पुनः प्रायश्चित्तादिभिः संशुद्धिः। सदसि स्वं पापं उच्चार्य, ब्रह्मदंडं च निधाय,।२७। सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृत+पाप+अनुसारतः शक्त्या चरेत्। अशक्तः गो-अर्घ-आदिना अशठः (चरेत्)।'२८।

मामाच्या किंवा मित्राच्या स्त्रीशी संभोग केल्यास कुत्र्याचा जन्म तसेच व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना कृमीचा जन्म मिळतो. स्वैराचारी स्त्रियासुद्धा श्वानादि योनीत जाऊन अतिशय कष्ट भोगतात.२५.

**प्रायश्चित्त -** हा संवाद ऐकून त्रिविक्रम मुनींनी श्रीगुरूंना विचारले, कळत वा न कळत घडलेल्या पापाचा नाश कसा करतां येईल?

श्रीगुरू सांगत आहेत. पश्चात्तापाने तसेच प्रायश्चित्ताने उत्तम प्रकारे पापाची शुद्धी होते. विद्वान् ब्राह्मणांच्या सभेत प्रथम गाय, बैल किंवा द्रव्यस्वरूपांत ब्रह्मदंड द्यावा आणि आपल्या पापाचा उच्चार करावा.२७. नंतर सभेच्या आज्ञेने क्षौरपूर्वक केलेल्या पापाच्या तारतम्याने शक्त्यनुसार अब्दादि (वर्षभर आचरायचे) कृच्छ्रे अनुष्ठावीत. तेवढे अनुष्ठान करण्याची शक्ती नसेल तर गोदान करावे अथवा गाईच्या मूल्याएवढे द्रव्य दान करावे. किंवा निष्क (साडेबारा ग्रॅम) वा शक्य तेवढे सोने निष्कपटपणे द्यावे.२८.

**स्वल्पं तीर्थे दशस्नानाद् द्विशतास्वायमैरघम् । स्वर्णदानात्प्रणश्येत सद्गुरोर्दर्शनान्महत् ।।२९।।**
**त्र्यहं दिवा त्र्यहं सायं त्र्यहमद्यादयाचितम् । नाद्यात् त्र्यहं कायकृच्छ्रोऽयुतगायत्रिकाजपात् ।।३०।।**
**सहस्रहवनाद्वापि द्वादशद्विजभोजनात् । गोदानाच्छक्तितोऽर्घाद्वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति ।।३१।।**
**द्वादशद्युः पञ्चदश-ग्रासा भोज्याः सदा निशि । मासाच्छुद्धिः स्वल्पभुज्या क्षीराज्याद्याशनैश्च वा ।।३२।।**

स्वल्पं अघं तीर्थे दश+स्नानात्, द्विशत+असुयामैः (वा) प्रणश्येत्। महत् (पापं) स्वर्णदानात् सद्गुरोः दर्शनात् (वा) प्रणश्येत।२९। त्रि+अहं दिवा त्र्यहं सायं, त्र्यहं अयाचितं अद्यात्, त्र्यहं न अद्यात् कायकृच्छ्रः, अयुत+गायत्री+जपात् (वा)।३०। सहस्र+हवनात् वा, द्वादश द्विज+भोजनात्, गोदानात्, शक्तितः अर्घात् वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति।३१। द्वादश+द्युः पञ्चदश ग्रासाः भोज्याः, सदा निशि स्वल्पभुज्या मासात् शुद्धिः, क्षीर+आज्य+अशनैः च वा (शुद्धिः)।३२।

लहानसहान पापे तीर्थांत दहा स्नाने (प्रत्येक स्नानानंतर केस वाळेपर्यंत थांबून) केल्याने तसेच दोनशे प्राणायामांनी नष्ट होतात. महापाप सुवर्णदानाने किंवा सद्गुरूंच्या दर्शनाने नाश पावते.२९.

**प्राजापत्य कृच्छ्र -** तीन दिवस दिवसा, तीन दिवस रात्री आणि तीन दिवस अयाचित भोजन करून तीन दिवस उपोषण करावे म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होते; किंवा याचा पर्याय म्हणून दहा हजार गायत्रीचा जप करावा;३०. किंवा गायत्री मंत्राचे हजार तुपाच्या आहुतींचे हवन करावे; किंवा बारा ब्राह्मणांना भोजन द्यावे; तसे गाईचे किंवा शक्त्यनुसार तितक्या मूल्याचे दान करावे म्हणजेही प्राजापत्य कृच्छ्र संपन्न होते.३१. पंधरा घास दिवसा आणि बारा घास रात्री अन्न घ्यावे; किंवा महिनाभर रात्री अल्प (अंजुळी) आहार करावा; किंवा दूध-तुपावर राहावे म्हणजे शुद्धी होते.३२.

**बिल्वाश्वत्थाब्जदर्भाम्बु-पानात् तीर्थाटनादपि । वाराणसीस्नानमात्राल्-लीयन्ते पापकोटयः ।।३३।।**
**अन्यतीर्थे त्वनुष्ठानाद्रामेश्वरसमीपतः । अब्धिस्नानाद्ब्रह्महत्या-कृतघ्नाद्यघसंहृतिः ।।३४।।**
**लक्षसंख्याकगायत्री-जपान्मद्यपसंशुचिः । कोट्या ब्रह्मघ्नोऽष्टलक्षैर्गुरुतल्पगतस्य च ।।३५।।**
**सप्तलक्षात्स्वर्णहर्तुः पावमानीभिरप्युत । इन्द्रं मित्रं शुनःशेप-सूक्तं पौरुषशान्तिके ।।३६।।**
**त्रिसुपर्णं नाचिकेतमघमर्षणवैष्णवे । मासमात्रं जपेत्स्वल्पे षण्मासं च महत्यघे ।।३७।।**

बिल्व+अश्वत्थ+अब्ज+दर्भ+अंबु+पानात् तीर्थ+अटनात् अपि, वाराणसी+स्नान+मात्रात् पापकोटयः लीयन्ते।३३। अन्यतीर्थे तु अनुष्ठानात्। रामेश्वर+समीपतः अब्धि+स्नानात् ब्रह्महत्या+कृतघ्नादि अघ+संहृतिः।३४। लक्ष+संख्याक+गायत्री+जपात् मद्यप+संशुचिः। कोट्या ब्रह्मघ्नः, अष्टलक्षैः गुरु+तल्प+गतस्य च (शुद्धिः)।३५। सप्तलक्षात् स्वर्णहर्तुः (शुचिः)। पावमानीभिः अपि उत 'इंद्रं मित्रं', 'शुनःशेप', पौरुष+शांतिके।३६। त्रिसुपर्णं, नाचिकेतं, अघमर्षण+वैष्णवे, स्वल्पे (अघे) मासमात्रं जपेत्। महति अघे च षण्मासं जपेत्। ३७।

बेल, पिंपळ, कमळ यांच्या पानांनी किंवा कुशोदकाचे पाणी रोज घेऊन उपवास केल्याने पर्णकृच्छ्र होते. तसेच तीर्थयात्रांनी आणि काशीला गंगास्नानाने पापांच्या कोटी लयाला जातात.३३. अन्य तीर्थांत मात्र अनुष्ठानानेच पापनाश होतो. रामेश्वरासन्निध समुद्रस्नान केल्याने ब्रह्महत्या, कृतघ्नता इत्यादि पापांचा नाश होतो.३४.

**वेदमंत्रांनी शुद्धी -** एक लाख गायत्रीमंत्राचा जप केल्याने मद्यपानाचे पाप जाते. एक कोटी जपाने ब्रह्महत्येपासून, आठ लाखांनी गुरुतल्पगमनाच्या पापाची शुद्धी होते. (गायत्रीच्या) सात लाख जपाने सुवर्णचोरीच्या पापाची शुद्धी होते. सर्व पवमान सूक्ताच्या (*'स्वाधिष्ठया'*पासून *'क्षीरं सर्पिर्मधूदकं'* पठणाने शुद्धी आहे. किंवा 'इंद्रं मित्रं' या एका मंत्राचा जप करावा. तसेच *'शुनःशेप'*सूक्त, पुरुषसूक्त किंवा शांतिसूक्त (*'शं न इंद्राग्नि'* ह्या पंधारा ऋचा) हे पाठ करावेत.३६. नारायणीय उपनिषदांतील त्रिसुपर्ण (भोजनाच्या आरंभी म्हटले जाणारे), कठ उपनिषत्, अघमर्षणाचे मंत्र किंवा *'अतो देवा'* इत्यादि विष्णुमंत्र लहानसहान पापांच्या परिमार्जनासाठी महिनाभर जपावेत. मोठ्या पापासाठी सहा महिने जप करावा.३७.

**चान्द्रायणं चरेद्ग्रासानेकैकं वर्धयेत्सिते । पक्षेऽन्यके ह्रासयेत्तैः शुचिगव्याशनेन च ।।३८।।**
**गोमूत्रं गोमयं क्षीरं दध्याज्यं सकुशोदकम् । मिलित्वा मन्त्रवद्धुत्वा पिबेत्सर्वाघशान्तये ।।३९।।**
**उभौ समं ह्यनन्तर-कृताघेणापि दम्पती । लिप्यते पापिसंसर्गी सोऽपि पापी भवेत्समः ।।४०।।**
**प्रायश्चित्तानि चीर्णानि दुष्टं हरिपराङ्मुखम् । नदीव सौरभाण्डं न निष्पुनन्ति कथञ्चन ।।४१।।**

चान्द्रायणं चरेत्। सिते पक्षे एक+एकं ग्रासान् वर्धयेत्। अन्यके ऱ्हासयेत्। तैः शुद्धिः। (पंच)गव्य अशनेन च।३८। गोमूत्रं, गोमयं, क्षीरं, दधि, आज्यं सकुश+उदकं मिलित्वा मन्त्रवत् हुत्वा सर्वाघ+शान्तये पिबेत्।३९। दुष्टं हरि+पराङ्+मुखं चीर्णानि प्रायश्चित्तानि न निष्पुनन्ति। नदी सौरभाण्डं इव।४०। अनन्तर+कृत+अघेण उभौ अपि दम्पती समं लिप्यते। पापी+संसर्गी सः अपि समः पापी भवेत्।४१।

**चांद्रायण** व्रतानेसुद्धां शुद्धी होते. शुक्ल पक्षाच्या प्रतिपदेला एक घास भोजन करायचे आणि मग चंद्राच्या कलेनुसार एक एक घास वाढवीत पौर्णिमेला पंधरा घासाचे भोजन करायचे. एक घास कोंबडीच्या किंवा मोराच्या अंड्याएवढा किंवा ओल्या आंवळ्याएवढा असावा. कृष्ण पक्षात परत एक एक घास कमी करीत अमावस्येला पूर्ण उपोषण करायचे. याला यवमध्य चांद्रायण असे म्हणतात. याउलट पौर्णिमेला पंधरा घास घेऊन एक एक घास कमी करीत अमावास्येला उपोषण करून पुन्हा शुक्ल पक्षात एक एक घास वाढवीत जाणे याला पिपीलिकामध्य चांद्रायण असे नाव आहे. यांत पूर्ण महिन्यांत एकूण २४० घास घेतले जातात. याला पर्याय म्हणून कुणी रोज चार चार घासांचे जेवण दोन वेळा (शिशुचांद्रायण) किंवा आठ घास एक वेळा (यतिचांद्रायण) घेतात. पंचगव्यानेही शुद्धी होतेच ते पुढच्या श्लोकांत वर्णिले आहे.३८.

**पंचगव्य** गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप हे पांच (पंचगव्य) कुशजलांत मिसळून अभिमंत्रित करून प्याल्याने सर्व पापांची शांती होते.३९. पती-पत्नीमध्ये एकाने पाप केले तरी दोघांनाही सारखाच दोष लागतो. तसेच पापी माणसाशी संसर्ग ठेवणाराही एका वर्षांत तेवढाच पापी होतो.४०. बंद तोंडाची दारूची बाटली जशी नदीत कितीही बुचकळली तर शुद्ध होत नाही, त्याचप्रमाणे अश्रद्ध, ईश्वरपराङ्मुख आणि भक्तिहीन दुष्टाने कितीही प्रायश्चित्ते आचरली तरी तो शुद्ध होत नाही.४१.

**इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा पतितं प्राह सद्गुरुः । प्राङ्मातापितृसंत्यागाल्लब्धा चण्डालताऽत्र ते ।।४२।।**
**मासमात्रं नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि । प्राहान्त्यजो योजय मां त्वद्दृक्पूतं द्विजातिषु ।।४३।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भूत्वापि पतिताद्वृद्धो देहस्तेऽसंस्कृतोऽशुचिः । वदन्ति पतितं न त्वामन्यत्प्रोक्तं कथं त्वया ।।४४।।**
**विश्वामित्रः पुरा क्षत्रो देवर्षित्वं तपोबलात् । देवान्ययाचे प्रोक्तं तैर्वसिष्ठात्स्वीकुरुष्व तत् ।।४५।।**

इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा सद्गुरुः पतितं प्राह। 'प्राक् माता+पितृ+संत्यागात् ते अत्र चण्डालता।४२। मासमात्र नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि।' अन्त्यजः प्राह, 'त्वत्+दृक्+पूतं मां द्विजातिषु योजय।'४३। श्रीगुरुः उवाच। 'पतितात् भूत्वा वृद्धः अपि ते देहः असंस्कृतः। त्वां पतितं अशुचिः वदन्ति। त्वया अन्यत् कथं प्रोक्तम्?'४४। पुरा क्षत्रः विश्वामित्रः तपो+बलात् देवान् देवर्षित्वं ययाचे। तैः प्रोक्तं 'तत् वसिष्ठात् स्वीकुरुष्व।'४५।

हे सर्व त्रिविक्रम स्वामींना सांगून समोरच्या चांडालाला सद्गुरू म्हणाले, 'पूर्वी मागील सातव्या जन्मांत तू आपल्या आई-वडिलांना टाकून दिल्याने ह्या जन्मांत तुला चांडाल योनी आली आहे.४२. एक महिनाभर नदीवर स्नान केल्याने तू शुद्ध होऊन मृत्यूनंतर ब्राह्मण जन्म पावशील.' त्यावर तो अंत्यज म्हणाला, 'आपल्या दृष्टिपाताने मी पवित्र झालो आहे. आतां मला ब्राह्मणांत मिळवून घ्या!'४३. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंत्यजापासून झालेल्या आणि त्याच ठिकाणी वाढलेल्या तुझ्या ह्या देहावर कसलेही संस्कार झाले नाहीत व होऊ शकत नाहीत. यासाठी तुला अस्पृश्य मानतात. तू हे भलतेच काय बोलतोस?'४४. 'पुरातन काळी क्षत्रिय कुळांत जन्म घेतलेल्या विश्वामित्राने आपल्या तपोबलाच्या आधारे देवांना आपल्याला ऋषित्व (ब्राह्मणत्व) देण्याची मागणी केली. देवांनी त्याला ते वसिष्ठ ऋषीकडून मान्य करून घ्यायला सांगितले.४५.

**वसिष्ठेनापि हीनत्वान्न दत्तं तत्सुतान्छतम् । हत्वा तं हन्तुकामोऽभूच्छङ्कितो ब्रह्महत्यया ।।४६।।**
**तदाज्ञया तपस्तप्तं तत्तु मेनकया हृतम् । विश्वामित्रः पुनस्तप्त्वा दग्धाङ्गोऽभूदृषीश्वरः ।।४७।।**
**तस्माद्भवान्तरे तेऽस्तु ब्रह्मत्वं गच्छ तेऽस्तु शम् ।।४८।।**

**।। पतित उवाच ।।**

**जाते स्वर्णेऽयसः पश्चात्कुतोऽयस्तद्वदप्यहम् ।।४९।।**

वसिष्ठेन अपि हीनत्वात् (तं देवर्षित्वं) न दत्तम्। (विश्वामित्रः) तत् सुतान् शतं हत्वा तं हन्तु+कामः अभूत्। ब्रह्महत्यया शङ्कितः।४६। तत् आज्ञया तपः तप्तम्। तत् तु मेनकया हृतम्। विश्वामित्रः पुनः तप्त्वा दग्ध+अङ्गः ऋषि+ईश्वरः अभूत्।४७। 'तस्मात् भव+अंतरे ते ब्रह्मत्वं अस्तु। गच्छ ते शं अस्तु।'४८। पतित उवाच। 'अयसः स्वर्णे जाते पश्चात् कुतः अयसः? तत् वत् अहं अपि।'४९।

वसिष्ठ ऋषींनीही त्याचा जन्म हीनकुळांत झाल्याने त्याला देवर्षित्व दिले नाही. तेव्हा विश्वामित्राने क्रोधाने त्याचे शंभर पुत्र ठार मारले. तो वसिष्ठांनाही मारायला उद्युक्त झाला; पण ब्रह्महत्येचा दोष लागेल या आशंकेने थांबला.४६. त्याच वसिष्ठांच्या आज्ञेने त्याने आणखी तप केले. पण इंद्राने पाठविलेल्या मेनकेने त्याचे हरण केले. विश्वामित्राने पुनः तसेच तप शरीर जळेपर्यंत केले आणि नूतन शरीर धारण करून तो ब्रह्म ऋषीची पदवी पावला.४७. एवढ्यासाठी या जन्मात नाही तरी पुढच्या जन्मात तू ब्राह्मण होशील. जा, तुझे कल्याण असो!४८. त्यावर पतित म्हणाला, 'एकदां लोखंडाचे सोन्यांत रूपांतर झाल्यावर ते पुन्हां लोखंड कसे होईल? त्याचप्रमाणे माझेही आहे. एकदा ब्राह्मण झाल्यावर मी परत चांडाल कसा होऊ?' ४९.

**तच्छुत्वा श्रीगुरुर्विप्र-भ्रान्त्या दूरात्स्त्रियं सुतान् । वारयन्तं वीक्ष्य शिष्यमाहामुं स्नापय द्रुतम् ।।५०।।**
**तदा लुब्धद्विजेनैष स्नापितः पतितः स्वकैः । सहागाद्विस्मृतप्राप्त-ज्ञानो हीनो निजालयम् ।।५१।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**पतितोऽपि कृपादृष्ट्या पावितः स्नानमात्रतः । कथं स पूर्ववज्जातो भगवन्छिन्धि संशयम् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**क्षिप्तं भस्मार्पितं ज्ञानं विनष्टं क्षालनात्तु तत् । इयान् भस्मप्रभावः प्राग्वामदेवो महामुनिः ।।५३।।**

तत् श्रुत्वा (तथा) विप्र+भ्रांत्या स्त्रियं, सुतान् दूरात् वारयन्तं (तं पतितं) वीक्ष्य श्रीगुरुः शिष्यं आह, 'अमुं द्रुतं स्नापय।'५०। तदा लुब्ध+द्विजेन एष पतितः स्नापितः। विस्मृत+प्राप्त+ज्ञानः हीनः स्वकैः सह निजालयं अगात्।५१। त्रिविक्रम उवाच। 'पतितः अपि कृपा+दृष्ट्या पावितः। सः स्नान+मात्रतः कथं पूर्व+वत् जातः? भगवन् संशयं छिन्धि।'५२। श्रीगुरुः उवाच। 'भस्म क्षिप्त्वा ज्ञानं अर्पितं तत् तु क्षालनात् विनष्टम्। इयान् भस्म+प्रभावः। प्राक् वामदेवः महामुनिः वने चचार।५३।

त्याचे ते बोलणे ऐकून व तो आपल्याला बोलावणाऱ्या पत्नी व मुलांना दुरूनच परतवत असलेला पाहून श्रीगुरू शिष्याला म्हणाले, 'याला लवकर आंघोळ घाला!'५०. मग एका लोभी ब्राह्मणाने त्या पतिताला स्नान घातले. तेव्हा त्या चांडालाला आधी झालेले ज्ञान नष्ट झाले व तो कुटुंबीयांसह आपल्या घरी गेला.५१. हे सर्व पाहत असलेल्या त्रिविक्रम स्वामींनी श्रीगुरूंना विचारले, 'आपल्या कृपादृष्टीच्या प्रभावाने पावन झालेला हा चांडाल केवळ स्नानानेच कसा पहिल्यासारखा झाला? भगवंता, आपण ह्या माझ्या शंकेचे समाधान करावे.'५२. श्रीगुरू म्हणाले, 'भस्म टाकून त्याला ज्ञान दिले. भस्म धुवून टाकल्याबरोबर ते नाहीसे झाले! हा सगळा भस्माचा प्रभाव आहे.' श्रौत असो वा स्मार्त असो, कोणतेही कर्म करतांना भस्म धारण करणे आवश्यकच असते. त्याची आवड निर्माण व्हावी म्हणून भस्ममाहात्म्याचे पूर्व इतिहासासहित वर्णन करीत आहेत. पूर्वीच्या काळी वेदांनी गौरविलेले वामदेव महर्षि,५३.

**वने चचार तं प्रात्तुमागतो ब्रह्मराक्षसः । स्पर्शमात्रात्प्रशान्तोऽभूज्ज्ञाताऽखिलनिजोद्भवः ।।५४।।**

**।। ब्रह्मराक्षस उवाच ।।**

**प्राक्श्रीमत्तोऽस्मि राट्कामी ब्राह्मणाद्यन्तजातिजाः । भुक्ताः श्रेष्ठाः स्त्रियोऽल्पाश्च सहैकैकामनन्तशः ।।५५।।**

**हठाद्दानादिनानीय भुक्ता मद्राष्ट्रसंस्थिताः । नरा राष्ट्रान्तरं जग्मुः सस्त्रीका दोषकातराः ।।५६।।**

**ततो रुग्णस्य मे राज्यमाक्रान्तं शत्रुभिस्ततः । कृच्छ्रात्प्रेत्य मया भुक्ता पितृभिः सह दुर्गतिः ।।५७।।**

तं प्रात्तुं ब्रह्मराक्षसः आगतः। (सः वामदेवस्य अङ्ग) स्पर्शात् प्रशांतो अखिल+निज+उद्भवः ज्ञाता अभूत्।'५४। ब्रह्मराक्षस उवाच। 'प्राक् श्रीमत्तः कामी राट् अस्मि। ब्राह्मण+आदि+अंत्य+जातिजाः श्रेष्ठाः अल्पाः च स्त्रियाः एक+एकाम् सह अनन्तशः भुक्ताः।५५। हठात् दानादिना आनीय भुक्ताः। मत्+राष्ट्र+संस्थिताः नराः दोष+कातराः सस्त्रीकाः राष्ट्र+अंतरं जग्मुः।५६। ततः मे रुग्णस्य राज्यं शत्रुभिः आक्रान्तम्। ततः कृच्छ्रात् प्रेत्य मया पितृभिः सह दुर्गतिः भुक्ता।५७।

एकदां गहन वनात संचार करीत असताना त्यांना खाण्यासाठी एक ब्रह्मराक्षस त्यांच्यावर धांवून आला. पण त्यांचा अंगस्पर्श होतांच त्याचा सगळा त्वेष जाऊन तो एकदम शांत झाला. तसेच त्याला आपल्या सर्व पूर्वजन्मांची स्मृतीही आली.५४. ब्रह्मराक्षस वामदेवांना सांगू लागला. 'पूर्वजन्मी मी संपत्तीने माजलेला कामासक्त असा राजा होतो. ब्राह्मणापासून अगदी हीनयातीत जन्मलेल्या, प्रौढ, अल्पवयीन, वयांतही न आलेल्या स्त्रियांचा मी भोग घेतला. एकदा भोगून झाल्यावर मग त्यांची विचारपूसही केली नाही.५५. पैशांनी वगैरे त्या आल्या नाहीत तर बलात्काराने मी धरून आणून त्यांचा उपभोग घेत असे. त्यामुळे माझ्या राज्यांतील लोक हा जातिसंकराचा दोष टाळण्यासाठी म्हणून आपापल्या स्त्रियांना घेऊन परराष्ट्रांत जाऊन राहिले.५६. पुढे मी व्याधिग्रस्त झालो असता शत्रूंनी माझे राज्य हिरावून घेतले. मला कष्टप्रद मरण आले. मृत्यूनंतर मला माझ्या पितरांसह नरकवास भोगावा लागला.'५७.

**प्रेतो व्याघ्रश्चाजगरः सालावृक उ सूकरः । शरठः श्वा क्रोष्टुमृगौ कुक्कुटः कपिचिल्लकौ ।।५८।।**
**नकुलः काक ऋक्षश्च कुक्कुटः खर ओतुकः । भेकः कूर्मो मत्स्य आखुर्घूको हस्तीह राक्षसः ।।५९।।**
**एता योनीर्मया भुक्ताः कृच्छ्रात्क्षुत्तृट्प्रपीडितः । त्वामत्तुमागमन् सद्यः शान्तो जातोऽस्म्यदः कथम् ।।६०।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**अङ्गे भस्मास्ति तत्स्पर्शाज्ज्ञानं जातं तवादितः । तन्माहात्म्यमिदं यत्तु सदा प्रीत्या शिवो दधौ ।।६१।।**
**पुरैको द्राविडे विप्र औपपत्ये हतो बहिः । त्यक्तस्तत्रैव भस्माक्त-श्वस्पर्शाद्भस्मभूषितः ।।६२।।**

'प्रेतः, व्याघ्रः, अजगरः, सालावृकः उ सूकरः, शरठः, श्वा, क्रोष्टु+मृगौ, कुक्कुटः, कपि+चिल्लकौ,।५८। नकुलः, काकः, ऋक्षः, च कुक्कुटः खरः, ओतुकः, भेकः, कूर्मः, मत्स्यः, आखुः, घूकः, हस्ती, इह राक्षसः।५९। एता योनीः मया कृच्छ्रात् भुक्ताः। सद्यः क्षुत्+तृट्+प्रपीडितः त्वां अत्तुं आगमन् शान्तः जातः अस्मि। अदः कथम्?'६०। वामदेव उवाच। 'अङ्गे भस्म अस्ति। तत्+स्पर्शात् तव आदितः ज्ञानं जातम्। इदं तत्+माहात्म्यं यत् तु शिवः सदा प्रीत्या दधौ।६१। पुरा द्राविडे एकः विप्रः औपपत्ये हतः बहिः त्यक्तः। तत्र एव भस्माक्त+श्व+स्पर्शात् (सः) भस्मभूषितः।६२।

पिशाच, वाघ, अजगर, खोकड, डुक्कर, सरडा, कुत्रा, कोल्हा, कोंबडा, वानर, घार,५८. मुंगूस, कावळा, अस्वल, रानकोंबडा, गाढव, मांजर, बेडूक, कासव, मासा, उंदीर, घुबड, हत्ती आणि शेवटी आत्तांचा हा ब्रह्मराक्षस,५९. इतक्या योनींत जन्मून मला कष्ट भोगावे लागले. तहान-भुकेने कासावीस होऊन आज मी तुम्हांला खाण्यासाठी धांवून आलो असता मी एकदम शांत झालो. हे असे कसे झाले?६०. वामदेव त्याला म्हणाले, 'माझ्या अंगावर जे भस्म आहे त्याच्या स्पर्शामुळे (तूं शांत होऊन) तुला सर्व पूर्वीचे ज्ञान झाले. त्या भस्माचेच हे माहात्म्य आहे जे साक्षात् भगवान् शंकर सदा प्रेमपूर्वक धारण करतात.६१. पूर्वी द्रविड देशामध्ये एक ब्राह्मण व्यभिचारावरून झालेल्या भांडणांत मारला गेला व त्याला गावाबाहेर टाकण्यांत आले. तिथे भस्माने माखलेल्या कुत्र्याच्या स्पर्शाने ते भस्म त्याच्या शरीराला लागले.६२.

**असून्जहौ तदा प्राप्तान्याम्यान्दूतान्निवार्य तम् । भस्मदग्धमलं शैवा दूता निन्युः शिवान्तिकम् ।।६३।।**

**।। राक्षस उवाच ।।**

**एवं चेद्भस्ममाहात्म्यं तत्स्वीकर्तुं समुत्सहे । तन्निर्माणप्रकारं मे शंस धार्यं कथं च तत् ।।६४।।**

**प्राग्ब्रह्मभ्योऽर्पिता वार्ता वाप्याद्या निर्जलस्थले । रचितास्तत्फलं त्वेतत्पापान्ते तव दर्शनम् ।।६५।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**त्र्यक्षं सायुधपङ्क्तिहस्तमहिसत्सूत्रं शिवं श्वेतभं, पञ्चास्यं च कपर्दिनं स्मितमुखं वैय्याघ्रचर्माम्बरम् ।**

**चार्वम्बान्वितमिन्दुभालमु शिरोगङ्गं गणाद्यन्वितम्, स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमारमुनिराण्नत्वाऽब्रवीत्प्राञ्जलिः ।।६६।।**

असून् जहौ। तदा प्राप्तान् याम्यान् दूतान् निवार्य शैवाः दूताः तं भस्म+दग्ध+मलं शिव+अन्तिकं निन्युः।'६३। राक्षस उवाच। 'एवं भस्म+माहात्म्यं चेत् तत् स्वीकर्तुं समुत्सहे। तत्+निर्माण+प्रकारं, तत् च कथं धार्यं मे शंस।'६४। प्राक् ब्रह्मभ्यः वार्ता अर्पिता, निर्जल+स्थले वापी+आद्याः रचिताः। एतत् पाप+अन्ते तव दर्शनं तत्+फलम् (अस्ति)।'६५। वामदेव उवाच। 'त्रि+अक्षं स+आयुध+पंक्ति+हस्तं अहि+सत्+सूत्रं, श्वेतभं, पञ्च+आस्यं, कपर्दिनं च स्मित+मुखं, वैयाघ्र+चर्म+अम्बरं, चारु+अम्बा+अन्वितं, इन्दु+भालं उ शिरो+गङ्गं, गण+अन्वितं शिवं स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमार मुनि+राट् नत्वा प्राञ्जलिः अब्रवीत्।'६६।

भस्मामुळे त्याची पापे धुतली गेल्याने, त्याला न्यायला आलेल्या यमदूतांना परतवून शिवदूतांनी त्याला शिवलोकांत नेले.६३. ब्रह्मराक्षस म्हणाला, एवढं भस्माचे माहात्म्य ऐकून मलाही ते धारण करावे अशी स्फूर्ती होत आहे. ते कसे तयार करावे आणि कसे लावावे ते मला आपण सांगा.६४. पूर्वी मी ब्राह्मणांच्या उपजीविकेसाठी भूमी दान केली होती; तसेच पाणी नसलेल्या ठिकाणी विहिरी खणविल्या होत्या. पापाचा भोग सरल्यावर झालेले आपले दर्शन हे त्याचेच फळ आहे.६५. वामदेव सांगूं लागले, 'त्रिनेत्र, आयुधे धारण केलेल्या दहा भुजा, नागाचे यज्ञोपवीत धारण केलेल्या शुभ्र धवल वर्णाच्या, पंचमुखी, कवड्यांनी सुशोभित, सुहास्यवदन, व्याघ्राजिन पांघरलेल्या, वामांकी त्रैलोक्यमोहिनी पार्वतीमातेला घेतलेल्या कपाळावर चंद्र मिरविणाऱ्या तसेच शिरी गंगा धारण केलेल्या, गणसमूहांनी वेष्टिलेल्या भगवान शिवांना प्रसन्नचित्त पाहून मुनिश्रेष्ठ सनतकुमार नमस्कार करून हात जोडून त्याना म्हणाले.६६.

**जयेश्वरानन्त हराज शंभो जगन्निदानाल्पकसाधनं नः ।**
**मुक्त्यै शिवोपादिश दुष्कराणि प्रोक्तानि सर्वाणि तु साधनानि ।।६७।।**

**।। शिव उवाच ।।**

**दर्शनात्परिहृत्याघं भुक्त्वा शं विधिवद्धृतेः । भस्मनः पुरुषोऽह्नाय जीवन्मुक्तो भवत्यलम् ।।६८।।**
**यज्ञोत्थं वा करीषोत्थमग्निरित्यादिमन्त्रितम् । धार्यं त्र्यायुषमित्येतैरङ्गुलीभिः प्रतिस्थलम् ।।६९।।**
**त्रिपुण्ड्रा भ्रूसमा रेख्या वर्णादिस्मृतिपूर्वकम् । त्र्यर्णास्त्रिदेवास्त्रिगुणास्त्रिरात्मानस्त्रिशक्तयः ।।७०।।**

'हे हर! हे अज! हे अनंत! हे शंभो! हे जगन्निदान! नः मुक्त्यै अल्पक+साधनं उपादिश। हे शिव! सर्वाणि प्रोक्तानि साधनानि तु दुष्कराणि।'६७। शिव उवाच। 'दर्शनात् अघं परिहृत्य, विधिवत् धृतेः भस्मनः शं भुक्त्वा पुरुषः अह्नाय अलं जीवन्मुक्तः भविष्यति।६८। यज्ञ+उत्थं वा करीष+उत्थं 'अग्निः' इत्यादि मंत्रितं, 'त्र्यायुषं' इत्येतैः अङ्गुलीभिः प्रतिस्थलं धार्यम्।६९। वर्णादि+स्मृति+पूर्वकं भ्रूसमा त्रिपुंड्रा रेख्या। त्रि+अर्णाः, त्रि+देवाः, त्रि+गुणाः, त्रिः+आत्मनः, त्रि+शक्तयः,।७०।

'हर, अनंत, अज, शंभो, हे जगत्कारण, आम्हांला या जन्म-मरणरूपी संसारापासून मुक्त होण्यासाठी एखादे छोटे आणि सोपे असे साधन सांगा. आतांपर्यंत आपण उपदेशिलेली सर्व साधने खरोखर दुष्कर आहेत.६७.

**भस्ममाहात्म्य -** भगवान शंकर म्हणाले, 'भस्माच्या केवळ दर्शनाने पापांचा परिहार करून, ते विधिपूर्वक धारण केल्याने सुख भोगून पुरुषाला शीघ्रच जीवन्मुक्त करते. अधिक काय सांगावे?'६८. यज्ञापासून झालेले किंवा जाबालांनी सांगितलेल्या पद्धतीने वाळलेल्या शेण्या जाळून केलेले भस्म उत्तम होय. ते 'अग्निरिति भस्म..' इत्यादि मंत्राने अभिमंत्रावे आणि 'त्र्यायुषं' इत्यादि मंत्रांनी तीन बोटांनी कपाळादि ठिकाणांवर लावावे.६९. भिवईच्या रुंदीच्या तीन रेघा वर्णादींचे स्मरण करून ठिकठिकाणी लावाव्या. 'अ', 'उ', 'म' हे तीन वर्ण (अक्षरे), ब्रह्मा-विष्णू-महेश्वर ह्या तीन देवता, सत्त्व-रज-तम हे तीन गुण, विश्व-तैजस-प्राज्ञ हे तीन अभिमानी (आत्मे), इच्छा-द्रव्य-क्रिया,७०.

**त्रिछन्दसस्त्रिलोकास्त्रि-वेदास्त्रिषवणाः स्मृताः । सर्वाघहृत्सदा सर्वैर्धार्यं तद्विधिवन्नरैः ।।७१।।**
**भक्त्याज्ञेनापि तद्धार्यं तारकं नापरं ह्यतः । परस्त्रीगोनिन्दकोऽसन् क्षेत्रहृत्परपीडकः ।।७२।।**
**गृहदाही मृषावादी खलो वेदरसक्रयी । नीचाच्च दुष्प्रतिग्राही वृषलीविधवादिगः ।।७३।।**

त्रि+छंदसः, त्रिलोकाः, त्रि+वेदाः, त्रि+षवणाः स्मृताः। तत् सर्व+अघ+हृत् सर्वैः नरैः सदा विधिवत् धार्यम्।७१। अज्ञेन अपि तत् भक्त्या धार्यम्। अतः न अपरं तारकं (अस्ति) हि। (पर+स्त्री+गः, निन्दकः, क्षेत्र+हृत्ट पर+पीडकः।७२। (परस्त्रीगः, निन्दकः, असन्, क्षेत्रहृत्, परपीडकः), गृहदाही, मृषावादी, खलः, वेद+रस+क्रयी, नीचात् दुः+प्रतिग्राही, वृषली+विधवा+आदि+गः,।७३।

ह्या तीन शक्ती, गायत्री-उष्णिक्-अनुष्टुभ हे तीन छंद, भूः-भुवः-स्वः हे तीन लोक, ऋग्वेद-यजुर्वेद-सामवेद हे तीन वेद आणि प्रातः-माध्याह्न-सायं हे तीन सवन आहेत. सर्व पापहर अशा भस्माचे सर्व वर्णाच्या तसेच सर्व आश्रमाच्या स्त्रीपुरुषांनी आणि विधवादींनीही - मनुष्यमात्रांनी, विधिपूर्वक धारण करावे.७१. अगदी अज्ञानी माणसानेही ते भक्तीपूर्वक लावावे; कारण ह्याच्याइतके तारक दुसरे साधनच नाही.७२.

**जाणून करणाऱ्याला अधिक फळ -** इतके आवर्जून सांगितल्यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो की केवळ भस्म लावण्याचेच एवढे पुण्य असेल तर मग ज्ञानाचे काय प्रयोजन! हिरडा खाल्ल्याने त्याचे ज्ञान असले वा नसले तरी विरेचन होतेच. त्याचे असे समाधान आहे की ज्याला ज्ञान असते त्याला अधिक लाभ होतो. पद्मरागादि मण्यांचा विक्रय करतांना भिल्लाला वगैरे जेवढे पैसे मिळतात त्याहून मण्यांचे ज्ञान असलेल्या सराफाला अधिक लाभ होतो हे आपण पाहतोच ना? छांदोग्यांत (१:१:१०) सांगितले आहे की ज्ञानपूर्वक, श्रद्धेने आणि ध्यानयोगाने केलेले कर्मच अधिक वीर्यशाली होते. जाणून कर्म करावे अशी श्रुतीही आहे. यासाठी जाणून - समजून केलेल्या कर्माचे फल उत्कृष्ट होते. हा नियम सर्वच कर्मांना लागूं आहे.

'परस्त्रीगामी, निन्दक, अधर्माचारी,जमीन लुबाडणारा, घराला आग लावणारा, खोटा आरोप करणारा, दुष्ट, वेद आणि रस (विष, मद्य आदि) यांचा विक्रय करणारा, हीनाकडून निषिद्ध दान घेणारा, कुमारिका किंवा विधवा स्त्रियांशी संग करणारा,७३.

**ज्ञानाज्ञानकृताऽघोपि मुक्तः स्याद्भस्मधारणात् । भस्मत्रिपुण्ड्ररुद्राक्षैः स्वः पूज्यो ना पुमर्थदैः ॥७४॥**
**सहस्रप्राक्परोत्पत्ति-दोषघ्नं व्याधिनाशनम् । तीर्थाप्लुतिजपाधिक्य-फलदं भस्मधारकम् ॥७५॥**
**स्वरादिलोकं नीत्वान्ते शैवे स्थापयति ध्रुवम् । सनत्कुमार सुलभं तारकं भस्मधारणम् ॥७६॥**
**एवं सनत्कुमारेश-संवादस्ते मयोदितः । तस्मात्त्वं परिधत्स्वाङ्गे भस्मेत्युक्त्वा ददौ मुनिः ॥७७॥**
**राक्षसोऽपि तदादाय भस्माङ्गे विधिवद्दधौ । तदैव राक्षसीं हित्वा तनुं मुक्तोऽभवत्क्षणात् ॥७८॥**

ज्ञान+अज्ञान+कृत+अघः अपि भस्मधारणात् मुक्तः स्यात्। पुं+अर्थदैः भस्म+त्रिपुण्ड्र+रुद्राक्षैः ना स्वः पूज्यः।७४। भस्म+धारकं सहस्र+प्राक्+पर+उत्पत्ति+दोष+घ्नं, व्याधि+नाशनं, तीर्थ+आप्लुति+जप+आधिक्य+फलदम्।७५। स्वः+आदि+लोके नीत्वा अन्ते शैवे ध्रुवं स्थापयति। (हे) सनत्कुमार भस्मधारणं सुलभं तारकं (च)।७६। एवं सनत्कुमार-ईश+संवादः ते मया उदितः। तस्मात् त्वं भस्म अङ्गे परिधत्।' इति उक्त्वा मुनिः (भस्म) ददौ।७७। 'राक्षसः अपि तत् भस्म आदाय विधिवत् अङ्गे दधौ। तदा एव (सः) राक्षसीं तनुं हित्वा क्षणात् मुक्तः अभवत्।७८।

जाणून किंवा अजाणतां पाप करणारे अंगाला भस्म लावल्याने त्या पापापासून मुक्त होतात. मानवाला पुरुषार्थांची (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) प्राप्ती करून देणाऱ्या भस्माचे त्रिपुंड्र तसेच रुद्राक्ष धारण करणारे मानव स्वर्गांतही पूज्य होतात.७४. भस्म धारण करणाऱ्याच्या पूर्वापर हजार जन्मांचे दोष नष्ट करून, तसेच त्याच्या व्याधींचाही नाश करून, तीर्थस्नान, जप इत्यादिकांपेक्षाही अधिक फळ भस्म देते.७५. स्वर्गादि लोकांत नेऊन शेवटी निरतिशयानंदरूप शैवलोकांत शाश्वत पुनरावृत्तीरहित ठेवून देणारे हे भस्मधारण तारक तर आहेच, पण तुला हवे तसे सुलभही आहे.७६. हे राक्षसा, असा हा सनत्कुमार आणि महादेव यांचा संवाद मी तुला सांगितला. तरी तूं हे भस्म स्वतःच्या शरीराला लावून घे.' असे म्हणून वामदेव मुनींनी त्याला आपल्याजवळचे भस्म दिले.७७. तेव्हां ब्रह्मराक्षसानेही ते भस्म घेऊन मंत्रासह अंगावर धारण केले. त्याच वेळी त्याने त्या राक्षस देहाचा त्याग केला आणि तत्क्षणी तो मुक्त झाला.७८.

**तदैवाप्तं विमानं स तेनागात्तत्क्षणाद्दिवम् ।**
**तस्मान्मुने भस्मशक्तिं ज्ञात्वाङ्गे धेहि मुच्यसे ।।७९।।**
**एवं गुरूक्तं ह्यभिगृह्य हृष्टो भक्त्योपसंगृह्य तमाज्ञयागात् ।**
**त्रिविक्रमोऽन्येऽपि हि तत्प्रमाणं मत्वोत्तमं चेरुरथो तथैव ।।८०।।**
**एवं क्रियाविपाकोऽयमीदृक्श्रुतिभयङ्करा ।**
**दण्डधृग्यातना तस्माच्छ्रेय एव सदाचरेत् ।।८१।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मविपाको नाम पञ्चदशोऽध्यायः ।।१५।।**

तदा एव विमानं आप्तम्। तेन सः तत् क्षणात् दिवं अगात्। तस्मात्, हे मुने, भस्म+शक्तिं ज्ञात्वा अङ्गे धेहि। मुच्यसे।'७९। एवं गुरु+उक्तं अभिगृह्य हृष्टः त्रिविक्रमः तं उपसंगृह्य आज्ञया अगात्। अन्ये अपि हि अथः तत् प्रमाणं उत्तमं मत्वा तथा एव चेरुः।८०। एवं क्रिया+विपाकः दण्ड+धृक्+यातना ईदृक् श्रुति+भयंकरा। तस्मात् श्रेय एव सदा आचरेत्।८१।

तात्काळ त्याच्यासाठी विमान आले आणि त्यात बसून तो सगेच स्वर्गाला गेला. ही कथा सांगून श्रीगुरू त्रिविक्रमांना म्हणाले, 'हे मुनिराज, हे भस्माचे सामर्थ्य जाणून ते नित्य शरीरावर धारण करा, म्हणजे मुक्त व्हाल!'७९. हा श्रीगुरूंचा उपदेश श्रवण करून संतोष पावलेल्या त्रिविक्रम स्वामींनी भक्तिपूर्वक त्यांना वंदन केले आणि त्यांची आज्ञा घेऊन कुमसीला गेले. तिथे जमलेले इतरही सद्गुरूंचा हा उपदेश श्रेष्ठतम प्रमाण मानून त्याप्रमाणेच आचार करू लागले.८०. असे हे कर्मविपाक आणि यमयातना ऐकायलासुद्धा भयंकर आहेत. मग भोगायला किती भयानक असतील? छांदोग्योपनिषदांत (५:१०:७) ह्याचे स्पष्ट दिग्दर्शन आहे. जे इथे भूलोकांत गलिच्छ आचरण करतात ते श्वान-सूकर-चांडालादि गलिच्छ योनींत जन्म घेतात. जे इथे चांगले आचरण करतात त्यांना तशाच चांगल्या योनीत (ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य) जन्म मिळतो. तरी श्रेयाचे म्हणजे सत्कर्माचेच आचरण मनुष्याने करावे. गरुडपुराणाच्या

प्रतिपादनानुसार (प्रेतकल्प, धर्मकांड ११:१२) स्वर्ग आणि मोक्ष या दोन्हींचे साधन असणारा हा मनुष्यजन्म लाभूनही जे त्यातले एकही साधत नाहीत ते स्वतः घोर वंचना करतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला दुसरा आणि प्रथमपासून पंधरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। षोडशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**नमस्ते ब्रूहि चरितं हरेरद्भुतकर्मणः । शृण्वतोऽपि न मे तृप्तिरमृतं पिबतो यथा ।।१।।**

नामधारक उवाच। (भो सिद्ध) ते नमः। अद्भुत+कर्मणा हरेः चरितं ब्रूहि। शृण्वतः अपि मे न तृप्तिः यथा अमृतं पिबतः।१।

श्रीगणेशाय नमः। *सोळाव्या अध्यायीं सतीला श्रीगुरु स्त्रियांचे धर्म उपदेशिती। सवेंचि करुणाघन तियेच्या मृत पतीला जिवंत करिती।।१।।*

**श्रेय आणि प्रेय** - मागील अध्यायाच्या शेवटी सदा श्रेयाचीच कास धरावी असे म्हटले आहे. हे श्रेय म्हणजे काय ते कठोपनिषदांत (१:२:१ -१:२:४) यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाच्या आरंभीच स्पष्ट केले आहे. श्रेय म्हणजे कल्याणाचा मार्ग. याउलट प्रेय म्हणजे ऐंद्रिय सुखाची वाट. विचारी माणूस प्रेयाच्या मागे न लागतो श्रेयाचा अंगीकार करतो. यांचे परिणाम परस्परविरोधी आहेत. श्रेयाची वाट चित्तशुद्धीद्वारा ज्ञानाकडे आणि अंतिम कल्याणाकडे जाते. ह्याला यमाने विद्या असे नाव दिले आहे. तर अविद्या अज्ञानांत रुतवणाऱ्या प्रेयाकडे नेते. ऐहिक आणि पारलौकिक विषयभोगांचे साधनभूत कर्म म्हणजे अविद्या; तर निरतिशय आनंदाचा लाभ करून देणारी विद्या म्हणजे ज्ञान. ह्या ज्ञानाचे स्वरूप आपण ज्ञानकांडात पाहिले आहे. मात्र हे ज्ञान विषयवासनांनी कलुषित चित्तांत सहसा स्फुरत नाही. त्या चित्ताच्या शुद्धीसाठी शास्त्रविहित नित्य आणि नैमित्तिक कर्म निष्काम बुद्धीने करणे आवश्यक आहे. त्या कर्माचे निरूपण पुढे तीन अध्यायांत केले आहे. त्यापूर्वी दोन अध्यायांत स्त्रियांचे धर्म निरूपिले आहेत.

नामधारकांनी सिद्धमुनींना नमस्कार करून विनंति केली की, 'अद्भुत चमत्कारांनी भरलेले श्रीगुरूंचे चरित्र आपण मला पुढे सांगा. ते कितीही ऐकले तरी माझे मन तृप्त होत नाही. जसे अमृत पिणाऱ्याला ते अधिकाधिक हवेच असते तसे!'१.

**।। सिद्ध उवाच ।।**

**सत्पृष्टं वत्स धन्योऽसि भवाब्धिर्लीलया जितः । चित्तं ते चरितैर्विद्धं हरेस्तेनास्मि तोषितः ।।२।।**
**को ब्रूयाद्भगवल्लीलां कति चित्राणि वच्मि ते । मूको ब्रूते प्रेक्षतेऽन्धो मृतो जीवति यद्दृशा ।।३।।**
**शृण्वेको माहुरे विप्रो गोपीनाथो धनी मृताः । तत्पुत्रा बहवोऽथैको जीवितो दत्तसेवया ।।४।।**
**दत्तप्रसादाच्चिरजीवितं सुतं नाम्नाकरोद्दत्तमिति द्विजातिजः ।**
**कान्तः सुलक्ष्मा मतिमान्सुसात्त्विकः पित्रोर्मृतार्भाकविनाश्यवर्धत ।।५।।**

सिद्ध उवाच। '(हे) वत्स, सत् पृष्टम्। धन्यः असि। भव+अब्धिः लीलया जितः। ते चित्तं हरेः चरितैः विद्धं तेन तोषितः अस्मि।२। भगवत्+लीलां कः ब्रूयात्? कति चित्राणि ते वच्मि। यत् दृशा मूकः ब्रूते, अन्धः प्रेक्षते, मृतः जीवति।३। शृणु। माहुरे एको धनी विप्रः गोपीनाथः। बहवः तत्+पुत्राः मृताः। अथ एकः दत्त+सेवया जीवितः।'४। दत्त+प्रसादात् चिर+जीवितं सुतं द्विजातिजः नाम्ना दत्त इति अकरोत्। कान्तः सुलक्ष्मः मति+मान् सुसात्त्विकः पित्रोः मृत+अर्भ+अक+विनाशी अवर्धत।५।

सिद्ध म्हणाले, 'वा! उत्तम प्रश्न विचारलास. यमाने जसे सोन्याची साखळी असलेल्या प्रेयाला सोडून श्रेयाची कांस धरल्याबद्दल नचिकेत्याचे अभिनंदन केले तसेच तुझे करायला हवे. तू खरेच धन्य आहेस! श्रवणभक्तीचा आदर करून तू हा दुस्तर जन्ममरणरूपी संसार लीलया जिंकला आहेस. श्रीगुरूंच्या चरित्राने तुझ्या मनाचा वेध घेतला आहे हे पाहून मला खूप आनंद वाटतो.२. भगवंताच्या लीला पूर्णतया कोण बरे सांगू शकेल? कुणीच नाही. कांही आश्चर्यकारक घटना मी तुला सांगतो. त्या श्रीगुरूंच्या केवळ कृपादृष्टीनेच मुका बोलू लागतो, आंधळा पाहू लागतो, एवढेच काय मेलेलासुद्धा जिवंत होतो.'३. तर ऐक. माहूर गांवी एक गोपीनाथ नावाचा धनाढ्य ब्राह्मण होता. त्याचे बरेच पुत्र लहानपणीच मरण पावले. मग श्रीदत्तप्रभूंच्या उपासनेने त्याचा एक मुलगा जगला.४. दत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने जगलेल्या त्या मुलाचे नाव ब्राह्मणानी 'दत्त' असेच ठेवले. तो सुंदर, तेजस्वी, सुलक्षणी, बुद्धिमान मुलगा मातापितरांचे आधीच्या मुलांच्या मृत्यूचे दुःख हलके करीत त्याच्या घरी वाढू लागला.५.

**सुसंस्कृतस्यास्य विधेः सुरूपिणी लब्धा वधूर्धीगुणशीलशालिनी ।**
**रतिः स्मरस्येव परस्परोत्थितमासीत्तयोः प्रेम रथाङ्गनामवत् ।।६।।**
**सरूपौ सुरूपौ स्वयोर्मन्यमानौ वियोगं कुयोगं क्षणं धर्मदक्षौ ।**
**उभौ तौ स्मरन्तौ सदाऽन्योऽन्यभद्रं न तन्द्रा न निद्रा पतिप्रेम्णि साध्व्याः ।।७।।**

अस्य सुसंस्कृतस्य विधेः सुरूपिणी धी+गुण+शालिनी वधूः लब्धा। तयोः रति+स्मरस्य इव परस्पर+उत्थितं प्रेम रथांगनामवत् आसीत्।६। तौ उभौ सरूपौ सुरूपौ स्वयोः वियोगं कुयोगं मन्यमानौ, धर्मदक्षौ, सदा अन्यः+अन्य+भद्रं स्मरन्तौ। साध्व्याः पति+प्रेम्णि न तन्द्रा न निद्रा (आसीत्)।७।

यथाकाल त्याचे मौंजीबंधनादि संस्कार झाले. त्याच्या सुदैवाने त्या सुंदर, बुद्धिमती आणि गुणवान् अशी पत्नीही लाभली. त्या दंपतीमध्ये रती आणि मदन यांच्यासारखे प्रेम निर्माण झाले आणि ते चक्रवाक पक्ष्यांच्या प्रेमाप्रमाणे दृढावले.६. ते दोघे पतिपत्नी सुंदर आणि परस्परांना अनुरूप असे होते. एकमेकांचा किंचितही वियोग त्यांना सहन होत नसे. धर्माचरणांत ते उभयतां दक्ष होते आणि एकमेकांचे हित जिह्वाळ्याने जपत होते. त्या साध्वीला तर पतीच्या प्रेमापुढे न झोप, ना थकवा येत असे. इथे **सरूपौ** शब्दाचा अर्थ सारख्या रूपाचे असा घेतला तर याज्ञवल्क्यस्मृतीतल्या विवाहप्रकरणांतील(५२) 'वधू वयाने आणि अंगाने वरापेक्षा लहान (*यवीयसी*) असावी' या वचनाचा विरोध होतो. म्हणून सरूपौचा अर्थ अनुरूप असाच होतो.७.

**लेपोऽत्युष्ण इवानिलोऽनलसमः शीतांशुरुष्णांशुवच्छय्या वृश्चिकवत्सुमस्रगहिवद्भूषाः समाः कण्टकैः ।**
**वाङ्माधुर्यमपि प्रदीपनसदृक्स्वाद्वन्नमप्युत्कटु प्रेष्ठे त्वन्तरिते क्षणं दृढतरां साध्व्या अभूत्सर्वदा ।।८।।**
**एवं सतोश्चापरिहार्यशोषवान् भर्ता सुसाम्यासहनाद्विधेरभूत् ।**
**क्षीणोऽरुचिः श्वासकफार्दितोऽनिशं दुःखोज्झितस्वापभुजिः सुमन्दवाक् ।।९।।**

प्रेष्ठे क्षणं अन्तरिते तु साध्व्या लेपः अति+उष्णः, अनिलः अनलसमः, शीत+अंशु उष्ण+अंशुवत्, शय्या वृश्चिकवत्, भूषाः कण्टकैः समाः, वाक्+माधुर्यं अपि प्रदीपनसदृक्, स्वादु+अन्नं अपि उत्कटु सर्वदा अभूत्। ८। एवं सतोः विधेः सुसाम्य+असहनात् भर्ता अपरिहार्य+शोषवान् अभूत्। क्षीणः अरुचिः अनिशं श्वास+कफ+अर्दितः दुःख+उज्झित+स्वाप+भुजिः, सुमन्द+वाक् (अभूत्)।९।

पतीच्या क्षणभरही विरहाने त्या साध्वीला गार लेपसुद्धा पोळत असे; शीतल वायूसुद्धा अग्निसारखा दाहक वाटे; चंद्राच्या चांदण्याचेही चटके बसत; मृदू शय्याही विंचवासारखी दंश करीत असे; अलंकार काट्यासारखे टोचत असत; मधुर भाषणसुद्धा तिच्या चित्ताचा क्षोभ करी; एवढेच काय, चविष्ट अन्नही अति तिखट लागे.८. असा त्या दंपतीचा सुखाचा संसार जणू दैवाला पाहवला नाही. पतीला असाध्य असा क्षय रोग झाला. तो अत्यंत क्षीण झाला, सतत श्वास आणि दमा यांनी बेजार झाला. या दुःखामुळे त्याची झोप आणि आहार अत्यंत कमी झाले.९.

**भुङ्क्ते यथान्नं स सती तथान्नं शेतेऽपि यावत्स सती तु तावत् ।**
**कृशोऽपि यद्वत्स सती तु तद्वत् छायापरेवास्य पतिव्रताऽभूत् ।।१०।।**
**वैद्योऽन्तिके तस्य कुगन्धशङ्कया न याति साध्वी सुमना न तं जहौ ।**
**भेजे पतिं स्नानसुगन्धिलेपनैः पादाङ्गसंवाहनभेषजार्पणैः ।।११।।**

सः यथा अन्नं भुङ्क्ते, तथा सती अन्नं (भुङ्क्ते)। (सः) यावत् शेते सती तु तावत् (शेते)। यद्वत् सः कृशः सती तु तद्वत् (कृशा)। पतिव्रता अस्य अपरा छाया अभूत्।१०। वैद्यः कुगंध+शंकया तस्य अंतिके न याति। सुमना साध्वी तं न जहौ। पतिं स्नान+सुगंधि+लेपनैः पाद+अङ्ग+संवाहन+भेषज+अर्पणैः भेजे।११।

**क्षयाची लक्षणे -** इथे श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत चरकसंहितेतील (निदानस्थान ६:१५-१७) क्षयाच्या अकरा लक्षणांचा निर्देश केला आहे. डोके जड पडणे, दम लागणे, खोकला, स्वर कांपरा होणे, कफ पडणे, रक्त पडणे, कुशीच्या बरगड्या, खांदे व फऱ्याचे हाड यांच्या वेदना, ज्वर, अतिसार आणि अन्न गोड न लागणे. अशक्त, क्षीण, रक्त आणि स्नायू कमी झालेला रोगी. क्षयाची लक्षणे सौम्य असली किंवा धोकाजनक नसली तरी तो अरिष्टकारीच मानावा. औषधोपचाराचा विशेष प्रभाव पडणार नाही असे तिथेच सांगितले आहे. यासाठी अपरिहार्य क्षय असे म्हटले आहे.

अशा स्थितीत त्या पतिव्रतेने केलेल्या पतीचे मार्मिक वर्णन श्रीस्वामिमहाराजांनी केले आहे. तो जेवढे अन्न घेत असे तेवढेच ती सती घेई. त्याला जितका वेळ झोप येई तितकाच वेळ तीही झोपत असे. तो जितका रोड झाला तितकीच ती सतीही रोडावली. एकूण काय तर ती साध्वी त्याची जणू दुसरी सावलीच होऊन गेली!१०. त्याच्या शरीराच्या दुर्गंधीमुळे वैद्यही त्याच्याजवळ जाण्याचे टाळू लागले. पण त्या थोर मनाच्या सतीने त्याला सोडले नाही. त्याला स्नान घालून त्याच्या शरीरावर सुगंधी लेप लावू लागली. त्याचे पाय, अंग चुरून देऊ लागली. त्याला वेळच्या वेळी औषध देत असे.११.

**शान्त्यार्चनैर्होमजपैश्च भेषजैर्दानैर्न यक्ष्मा किमपि व्यहीयत ।**

**श्यामामुखेन्दुं परिपूर्णमुद्ग्रसन्मन्दस्मितज्योत्स्नमभूत्परो ग्रहः ॥१२॥**

अर्चनैः, होम+जपैः, भेषजैः, दानैः, शान्त्या च यक्ष्मा किं अपि न व्यहीयत्। मन्द+स्मित+ज्योत्स्नं श्यामा+मुख+इन्दुं परिपूर्णं उद्ग्रसन् (यक्ष्मा) परः ग्रहः अभूत्।१२।

*'पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण बाधते। तच्छान्तिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः'* या मनुस्मृतीच्या वचनानुसार पूर्वजन्मी केलेल्या पापापासून उद्भवलेल्या या क्षयरोगाच्या उपशमासाठी देवपूजा, होम, जप, औषधी आणि दान हे उपाय करण्यात आले. पण तो रोग मुळीच हटला नाही. त्याने त्या श्यामेच्या मुखरूपी पूर्णचंद्राची ज्योत्स्नाच असलेले तिचे मंदस्मित राहूप्रमाणे पूर्णतः ग्रासून टाकले. पतीला झालेल्या क्षयरोगाने तिचे मुख म्लान झाले हे उपमालंकाराने सांगितले आहे. **श्यामा** या शब्दाचे दोन अर्थ टीकेत दिले आहे. सोळा वर्षांची बाला आणि उष्णकालांत शीत असणारी आणि शीतकालांत उष्ण असणारी युवती.१२.

इथे अशी एक शंका उपस्थित केली आहे की बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार **क्रियमाण कर्माचे फल** जन्मांतराने मिळते. तेव्हा व्याधीच्या उपशमासाठी केलेल्या देवपूजादि कर्मांचा सध्याच्या जन्मात कसा उपयोग होईल? त्याचे समाधान असे आहे की अत्यंत तीव्र पापाचे किंवा पुण्याचेही फळ ह्याच जन्मात भोगावे लागते. त्यानुसार ह्या जन्मात केलेल्या जपहोमादि कर्मांनी पूर्वजन्माच्या कर्माचा उपशम होऊन आरोग्याचा लाभ होऊ शकतो.

**द्विजं रुजार्तं च तथाविधां वधूं तयोर्न शेकुः पितरौ निरीक्षितुम् ।**
**निवारिता तैरपि सा पतिव्रता न तं जहावर्यमणं प्रभा यथा ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्राग्वैरतः कष्टमिदं मयार्पितं धृत्या पितः सात्त्विकयाम्ब जीवितुम् ।**
**साध्वर्हथस्ते सति पूर्ववैर्यहं तन्मां विहायाशु पितुर्गृहं व्रज ।।१४।।**

रुजा+आर्तं द्विजं च तथाविधां वधूं तयोः पितरौ निरीक्षितुं न शेकुः। तैः निवारिता अपि सा पतिव्रता, यथा अर्यमणं प्रभा, तं न जहौ।१३। विप्र उवाच। '(हे) पिता, (हे) अम्ब, मया प्राक्+वैरतः इदं कष्टं अर्पितम्। साधु सात्त्विकया धृत्या जीवितुम्। (हे) सति अहं ते पूर्ववैरी। तत् मां विहाय आशु व्रज।'१४।

रोगाने कष्टलेला तो मुलगा आणि त्याच्या सेवेने तेवढीच कष्टणारी त्याची पत्नी ह्यांच्याकडे पाहणेसुद्धा आईवडिलांना दुःसह झाले. त्यांनी आपल्या सुनेला इतके कष्ट करू नकोस असे सांगूनही पाहिले. पण त्या पतिव्रतेने, सूर्याला जशी त्याची प्रभा, तसे आपल्याला पतीपासून क्षणभरही दूर होण्यास नकार दिला.१३. त्या सर्वांचे क्लेश पाहून तो पुत्र आईवडिलांना म्हणाला, 'मी तुम्हांला हे दुःख देत आहे ते पूर्वजन्मीच्या कांही वैराचा सूडच असावे. तुम्ही आतां उत्तम सात्त्विक धैर्याने ते सहन करून जीवन कंठायचे आहे. मग तो आपल्या पत्नीला म्हणाला, मी तुझा पूर्वजन्मीचा दावेदार आहे. मला दुर्भाग्याला सोडून तू लवकर माहेरी जा.'१४.

॥ साध्व्युवाच ॥

**नार्हास्म्यनन्यशरणा परिहापितुं ते नन्वर्धसुन्दरशरीरविभागिनीयं ।**
**जीवोऽस्य साधुवपुषोऽस्ति भवान्वियुक्ते जीवे तनोर्ननु भवेत्खलु जीवहत्या ॥१५॥**
**सदा मदास्यं शशिशालि कालिमा कुतो यतो भैधत एवमेव ते ।**
**अकी सुखी यत्र भवत्यवत्यघात् तमीशमीडे स तु देवदेवतः ॥१६॥**
**नमो नमो वां श्वशुरौ मया श्रुतो गुरुः स गन्धर्वपुरेऽस्ति तारकः ।**
**असुप्रियोऽनामयमेति भाति मे सहामुना यास्य उ रोचतेऽपि वाम् ॥१७॥**

साध्वी उवाच। 'ते अनन्यशरणा परिहापितुं न अर्हा। ननु इयं अर्ध+सुंदर+शरीर+विभागिनी। भवान् अस्य साधु+वपुषः जीवः अस्ति। तनोः जीवे वियुक्ते खलु जीवहत्या भवेत्।'१५। सदा मत्+आस्यं शशि+शालि। कालिमा कुतो? यतो ते भा एधत एव। यत्र अकी सुखी भवति सः अघात् अवति। तं ईशं ईडि। स तु देवदेवतः।१६। (हे) श्वशुरौ, वां नमो नमः। मया श्रुतः गन्धर्वपुरे गुरुः अस्ति, सः तारकः। मे भाति असु+प्रियः अनामयं एति। अमुना सह यास्ये, वां रोचते अपि?'१७।

ती सती म्हणाली 'केवळ आपलाच एक आधार असलेल्या ह्या अगतिक स्त्रीचा त्याग उचित नाही. मी आपल्या या सुंदर शरीराची अर्धांगिनी आहे. आपण ह्या माझ्या शरीराचे प्राणच आहांत. देहापासून जीव वेगळा झाला तर ती जीवहत्याच होईल ना?' तिचे हे प्रतिपादन तैत्तिरीय संहितेच्या (६:१:८५) '*अर्धो वा एष आत्मा पत्नीशरीरम्।*' या वचनाशी सुसंगतच आहे.१५. माझे मुख सदैव तेजस्वीच आहे. आपली कांती जोवर वाढती आहे तोवर त्याला कुठलाही डाग लागणार नाही. दुःखी जीवाला सुखी करणारा आणि पापापासून रक्षण करणाऱ्या देवाची आपण स्तुती करू या. तोच सर्व देवांचाही देव आहे.१६. अहो मामंजी, मामी, तुम्हांला वारंवार नमन असो. मी असे ऐकले आहे की गाणगापूर येथे श्रीगुरू (नृसिंहसरस्वती) आहेत. तोच तारणहार आहे. आपल्याला जर रुचत असेल तर मी ह्यांना त्यांच्याकडे घेऊन जाते.१७.

**तावूचतुः क्वापि तव श्रमेण सम्राज्ञि जीवेत स तत्र गच्छ ।**
**श्रुत्वैवमाराच्छ्वशुरौ प्रणम्य तदाज्ञयाऽगात्सह तेन साध्वी ।।१८।।**
**सुखस्थितं मन्थरवाहवाहितं तमन्वगच्छत्पतिमङ्घ्रिचारिणी ।**
**दधौ कराकृष्टधवा गमानत-क्षमेभिभामुत्कुचगण्डकर्शिता ।।१९।।**
**क्रान्तेऽयनेथो कतिचिच्छनैः शनैर्मृत्युं धवोऽगात्स तदैव दैवतः ।**
**सा मर्तुमुत्कापि निवारितेतरैः शुक्तामसीम्लानमुखाम्बुजाऽवदत् ।।२०।।**

तौ ऊचतुः। (हे) सम्राज्ञि, तव श्रमेण सः (यत्र) क्वापि गच्छति तत्र गच्छ। एवं श्रुत्वा श्वशुरौ प्रणम्य तत्+आज्ञया तेन सह साध्वी अगात्।१८। सुख+स्थितं मन्थर+वाह+वाहितं तं पतिं अङ्घ्रि+चारिणी अनु+अगच्छत्। कर+आकृष्ट+धवा गम+आनत+क्षमा इभा+भां उत्कुच+गण्ड+कर्शिता दधौ।१९। कतिचित् शनैः शनैः अयने क्रान्ते तदा एव दैव+तः धवः मृत्युं अगात्। सा मर्तुं उत्का अपि इतरैः निवारिता। शुक्+तामसी+म्लान+मुख+अम्बुजा अवदत्।२०।

सासू-सासरे म्हणाले, 'वेदोक्तीला अनुसरून तू सम्राज्ञीच आहेस (ऋग्वेद १०:८५:४६). जिथे कुठे तुझ्या प्रयत्नांनी हा बरा होईल तिथे जा! याप्रमाणे त्यांची आज्ञा घेऊन आणि त्यांना नमस्कार करून आपल्या पतीसह ती सावित्री गाणगापूरला निघाली.१८. हळूहळू चालणाऱ्या भोयांनी चालविलेल्या मेण्यात सुखाने पतीला बसवून ती पायीच त्याच्यामागे चालू लागली. पाठीमागून तिने आपल्या पतीला धक्के बसू नयेत म्हणून धरले होते. हत्तीच्या गंडस्थलांप्रमाणे कठीण आणि उन्नत वक्षांच्या भारानेच जणू ती वाकली होती. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावानेच की काय पण खालची जमीनही नम्र झाली होती. हत्तीच्या मागे जाणाऱ्या हत्तीणीसारखी ती गजगामिनी भासत होती.१९. कांही दिवस याप्रमाणे हळूहळू मार्ग क्रमून गाणगापूरच्या जवळ आल्यानंतरच दैवयोगाने तिचा पती मृत्यू पावला. तिने तेव्हांच आत्महत्येचा प्रयत्न केला; पण इतरांनी तिला परावृत्त केले. पतीच्या मृत्यूचे दुःख हीच जणू रात्र, तिच्यामुळे तिचे मुखकमल कोमेजून गेले.आणि ती शोकग्रस्त बाला बोलू लागली.२०.

**कालात्ययं मा कुरु कुर्वथाह्निकमुत्तिष्ठ शेषे कति नाथ विप्रराट् ।**
**कस्मान्न मे दास्यसि वल्लभोत्तरं प्रेष्ठं नु किं ते वचनं व्यलङ्घ्यम् ॥२१॥**
**प्राणाः क्व याताश्च मनः क्व ते गतं द्राक्तान्परावर्तय जीवितुं चिरम् ।**
**लिप्तः स्वमातापितृदारहत्यया भविष्यसि त्वं न तथा करोषि चेत् ॥२२॥**
**उद्वाहितां क्वैषि विहाय मां प्रियां पुत्राननुत्पाद्य कथन्वृणोद्धृतिः ।**
**स्थातव्यमीश क्व कथं न भाषितं कथं व्रजेयं सदनं गुरोश्च वः ॥२३॥**

'(हे) नाथ, विप्र+राट् काल+अत्ययं मा कुरु, आह्निकं कुरु। उत्तिष्ठ, कति शेषे? (हे) वल्लभ कस्मात् मे प्रेष्ठं उत्तरं न दास्यसि? किं नु ते वचनं व्यलंङ्घ्यम्? २१। ते मनः क्व गतं, प्राणाः क्व याताः? तान् द्राक् परावर्तय चिरं जीवितुम्। त्वं तथा न करोषि चेत् स्व+माता+पितृ+दार+हत्यया लिप्तः भविष्यसि।२२।'मां उद्वाहितां प्रियां विहाय क्व एषि? पुत्रान् अनुत्पाद्य कथं नु ऋण+उद्धृतिः? (हे) ईश, क्व कथं स्थातव्यं न भाषितम्। वः गुरोः सदनं च कथं व्रजेयम्?२३।

'अहो नाथा, ब्राह्मणश्रेष्ठा, तुमची संध्येची वेळ कधीच टळत नाही, लवकर उठून संध्या करा. किती झोप ही? वल्लभा, प्रियतमा माझ्याशी तुम्ही का बरे बोलत नाही? मी कांही तुमची अवज्ञा केली का?२१. मन ज्याचे चिंतन करते तेच वाचा बोलते. वाचेचा उपसंहार झाल्यावर केवळ मनाचे मननच उरते. मनाचाही लय झाल्यावर प्राणच राहतात. म्हणून ती साध्वी पतीला विचारते आहे, तुमचे मन, तुमचे प्राण कुठे गेले? जर ते परलोकांत गेले असतील तर लवकर त्याना परत आणा. तुम्हाला अजून पुष्कळ काळ जगायचे आहे. तुम्ही जर तसे केले नाही तर तुम्हांला आपल्या मातापित्यांच्या आणि पत्नीच्या हत्येचा दोष लागेल.' तुमच्यामागे आम्ही कुणीच जगू शकत नाही असा अभिप्राय.२२. 'मला, तुमच्या परिणीत पत्नीला सोडून कुठे जाता? आपल्याला पुत्रही झालेला नसता तुम्ही पितरांच्या ऋणातून कसे मुक्त व्हाल? तुमच्यामागे मी कुठे आणि कसे राहावे तेही जाण्यापूर्वी तुम्ही सांगितले नाहीत! तुमच्या मातापित्यांच्या घरी तरी मी कशी जाऊ?२३.

**सर्वत्र पूता त्वयि जीवतीशितर्-मदास्यमप्यद्य न कोऽपि पश्यति ।**
**सव्रीडनर्मोक्तिसुतल्पहावयुक्ताम्बूललेपादि कथं न ते हृदि ।।२४।।**
**सुखं स्वपोरूत्कुचभारभङ्गभीभीतमध्यात्मसुतल्प ईश ।**
**किं ते शिलाढ्ये शयनं कुपृष्ठे सुप्तः पृथङ्नर्तुमृतेऽद्य किं तत् ।।२५।।**
**नक्रोऽप्सु यद्वत्तृषितं यथा द्रुः श्रान्तं यथा गां तृणगां च हिंस्रः ।**
**प्रासाद ईशेक्षकमुन्निहन्ति जातं तथा मे गुरुदर्शनाप्तेः ।।२६।।**

त्वयि ईशितः जीवति सर्वत्र पूता। अद्य मत्+आस्यं अपि कः अपि न पश्यति। सव्रीड+नर्म+उक्ति सुतल्पं हावयुक् ताम्बूल लेपादि कथं ते हृदि न?२४। (हे) ईश, उरु+उत्+कुच+भार+भङ्ग+भी+भीतं अध्यात्म+सुतल्पं सुखं स्वप। ते शिला+आढ्ये कुपृष्ठे शयनं किम्? ऋतुं ऋते पृथक् न सुप्तः। अद्य किं तत्?२५। यथा तृषितं अप्सु नक्रः, श्रान्तं द्रुः, तृणगां गां च हिंस्रः, ईश+ईक्षकं प्रासादः उत् निहन्ति, तथा मे गुरु+दर्शन+आप्तेः जातम्।'२६।

तुम्ही, माझे स्वामी जिवंत असतांना मी सर्वत्र पवित्र गणली जात होते. आता माझे तोंडही कुणी पाहत नाही. ते लाजत केलेले विनोद, ती सुखशय्या, श्रांगारिक भावाने दिलेले विडे, सुगंधी उटण्याचे लेप हे सगळेच तुम्ही विसरून गेलां काय?२४. पुष्ट आणि उन्नत स्तनांनी मोडण्याच्या भयाने जणू घाबरलेल्या कटीचा हा माझा देह हीच उत्तम शय्या आहे. तिच्यावर आपण सुखाने पहुडा. हे असे दगडांच्या खडबडीत पृष्ठावर का झोपला? ऋतुकाल सोडला तर आपण कधीही माझ्यापासून वेगळे झोपला नाहीत. मग आताच का बरे दूर झोपलात?२५. तहानलेला नदीवर पाणी पिण्यास जावा आणि त्याला सुसरीने धरावे, थकलाभागला झाडाखाली बसावा आणि ते झाडच त्याच्यावर पडावे, भुकेली गाय गवताळ रानांत शिरावी आणि तिथे वाघाने तिच्यावर झडप घालावी, देवाच्या दर्शनाला देवळांत आलेल्यावर ते देऊळच अंगावर पडावे तसे आपल्या भेटीला आलेल्या माझ्यावर हा घोर प्रसंग ओढवला आहे.२६.

**जयेश्वरानन्त कथं त्वया कृतं भिया त्वयात्रापहृतोऽस्ति किं पतिः ।**
**रुक्शान्तिशक्तिर्यदि ते न गम्यतामिति त्वयोक्ते कतमोऽर्दितुं क्षमः ।।२७।।**
**त्वया कृतं साधु यशो दिवं ते वहामि भर्त्रा सह गौरिमातः ।**
**क्वेता ह्यवैधव्यकदानशक्तिर्व्रतेश्वरीशे न कथं स्मृतिर्मे ।।२८।।**
**माङ्गल्यतन्तुं च निशां च कुङ्कुमं हर्तुं महांश्चोर इहागतः कुतः ।**
**सौभाग्यनौर्मे भवसिन्धुसंस्थिता सा कालमीनेन कथं नु चर्विता ।।२९।।**

(हे) ईश्वर (हे) अनन्त, जय! त्वया कथं कृतम्? अत्र भिया पतिः अपहृतः अस्ति किम्? यदि ते रुक्+शान्ति+शक्तिः न, त्वया 'गम्यताम्' इति उक्ते कतमः अर्दितुं क्षमः?'२७। 'त्वया साधु कृतं, ते यशो भर्त्रा सह दिवं वहामि। (हे) मातः गौरि अवैधव्यक+दान+शक्तिः क्व इता? (हे) ईशे, व्रत+ईश्वरी मे स्मृतिः कथं न?२८। माङ्गल्यतन्तुं च निशां च कुंकुमं हर्तुं महान् चोरः इह कुतः आगतः? मे सौभाग्य+नौः भव+सिन्धु+संस्थिता सा काल+मीनेन कथं नु चर्विता?२९।

'परमेश्वरा, अनंता, आपण हे काय केलेत? माझ्या पतीला निरोगी करण्याच्या धाकाने त्याला माझ्यापासून हिरावले काय? जर तुमचे रोग बरा करण्याचे सामर्थ्य नसेल आणि तुम्ही मला घालवून दिले तर आपल्याला जाब विचारण्याची कुणाची टाप आहे?'२७. 'छान केलंस देवा! तुझी कीर्ती या पतीसह आता स्वर्गांत घेऊन जाते. आई, मंगळागौरी तुझे अवैधव्य देण्याचे सामर्थ्य कुठे गेले? हे व्रताच्या देवी, भगवती, '*विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे*' अशी तुझी प्रार्थना करणाऱ्या माझा तुला कसा विसर पडला?'२८. 'माझ्या मंगलसूत्रावर आणि हळदीकुंकवावर घाला घालणारा हा काळरूपी महान् चोर इथे श्रीगुरूंच्या सान्निध्यांत कुठून आला?' श्रीगुरूंच्या जवळ मृत्यूलासुद्धा प्रवेश नाही असा तिचा भाव व्यक्त होतो. 'संसारसागरांतली माझी सौभाग्यनौका काळरूपी मगरीने कशी हो गिळून टाकली?'२९.

**एवं रुदित्वोरुकुचत्रुटत्पटा संस्मृत्य संस्मृत्य तदीयचेष्टितम् ।**
**प्रत्यङ्गमालम्ब्य रुरोद मोहतः साध्वी तदा कश्चन साधुराययौ ।।३०।।**
**रुद्राक्षभूषो भसिताक्तदेहः शूली बभाषे जटिलः स साध्वीम् ।**
**बाले शुचा नैति मृतः कुतस्त्वं मुधोच्चकै रोदिषि तिष्ठ तूष्णीम् ।।३१।।**
**मृत्युर्न केषां विषयोऽपि देवान्ग्रसत्यसौ चापरिहार्य एव ।**
**द्रौ व्यैक्यमब्धौ च यथेन्धनैक्यं भवप्रवाहेऽपि तथा धवादिः ।।३२।।**

एवं रुदित्वा उरु+कुच+त्रुटत्+पटा साध्वी तदीय चेष्टितं संस्मृत्य संस्मृत्य, प्रत्यंगं आलम्ब्य, मोहतः रुरोद। तदा कश्चन साधुः आययौ।३०। रुद्राक्ष+भूषः भसित+आक्त+देहः शूली सः साध्वीं बभाषे। '(हे) बाले, मृतः शुचा न एति। त्वं मुधा उच्चकैः कुतः रोदिषि? तूष्णीं तिष्ठ।३१। मृत्युः केषां न विषयः? असौ देवान् अपि ग्रसन्ति। अपरिहार्य एव। यथा द्रौ वि+ऐक्यं, अब्धौ च इन्धन+ऐक्यं, तथा भव+प्रवाहे अपि धवादिः।३२।

असा विलाप करीत रडत भेकत, अंगावरची चोळी फाटलेल्या अवस्थेत पतीच्या आठवणी काढीत, त्याच्या अंगप्रत्यंगांना कवटाळीत बेभान होऊन ती साध्वी शोक करीत असताना तेथे कोणी एक साधू आला.३०. गळ्यात रुद्राक्षाच्या माळा, अंगावर भस्माचे पट्टे आणि हातात शूल धारण केलेला तो साधू तिला म्हणाला, 'कितीही रडलीस तरी मेलेला परत येणार आहे का? तसे असेल तर अवश्य रड! पण तसे होत नाही. व्यर्थ उच्चस्वराने रडू नकोस. शांत राहा.३१. तुझ्या पतीच्या मृत्यूच्या दुःखाने हा शोक तू करत असशील तर असे पाहा, मृत्यू कुणाला चुकला आहे? हा देवादिकांचाही ग्रास करतो. तो अटळच आहे. पतीच्या विरहामुळे तुला दुःख झाले असे म्हणशील तर झाडावर पक्षी एका रात्रीसाठी एकत्र येतात आणि सकाळ झाली की आपापल्या वाटेने निघून जातात. किंवा समुद्रामध्ये लाकडाचे ओंडके एकत्र येतात आणि पुन्हा परस्परांपासून दूर वाहून जातात. तसे पती, पत्नी, माता, पिता, बंधू, भगिनी इत्यादि संबन्ध हे तात्कालिकच असतात. संसारसागरांत कांही क्षण मात्र एकत्र येऊन पुन्हा आपापल्या प्रारब्धानुसार आपापल्या कर्मानुसार भ्रमण करीत असतात.'३२

**सम्बन्ध एषां नियतो मतश्चेत् प्राग्जन्मनि त्वं वद कस्य का वा ।**
**सम्बन्धिनः कस्य न केऽद्वयत्वाज्जीवश्चिदंशोऽखिलगोऽव्ययोऽजः ।।३३।।**
**पञ्चात्मकेऽस्मिन्खलु संगतेऽत्र भर्त्रादिबुद्धिर्न तु तत्त्वतोऽस्य ।**
**काष्ठाग्निवत्तं तु पुमादिलिङ्ग-हीनं धवादिं प्रकृतिस्थमाहुः ।।३४।।**

'एषां संबन्धः नियतः मतः चेत् त्वं प्राक् जन्मनि कस्य का वा? अद्वयत्वात् कस्य के अपि संबन्धिनः न। जीवः चित्+अंशः अखिलगः, अव्ययः, अजः।३३। अस्मिन् पञ्च+आत्मके संगते अत्र भर्त्रा+आदि+बुद्धिः अस्य न तु तत्त्वतः। काष्ठ+अग्नि+वत् प्रकृति+स्थं पुं+आदि+लिङ्ग+विहीनं धव आदिं आहुः।३४।

'पती, पुत्र इत्यादि संबन्ध जर तुला कायमचे वाटत असतील तर मग सांग बरं तू पूर्वजन्मी कुणा पुरुषाची कोण - पत्नी, माता, कन्या इत्यादि होतीस? वेदांताच्या सिद्धांतानुसार (छांदोग्य उपनिषत् ६:२:१) 'एकच एक ब्रह्म आहे त्याहून वेगळे कांहीच नाही; आणि ते तू आहेस.' अर्थातच त्याला संबंधी कसे व कुठले असणार? 'हा जीव माझाच अंश आहे', या भगवद्गीतेच्या (१५:१७) प्रतिपादनानुसार जीव हा चैतन्याचाच अंश आहे. भगवंतांनीच दुसऱ्या अध्यायांत (२०) म्हटल्याप्रमाणे हा न कधी जन्मतो न मरतो, हा कधी कुणाचा झाला नाही किंवा होणार नाही; हा जन्ममृत्यूरहित, नित्य, शाश्वत आणि पुरातन आहे; शरीराचा नाश केला तरी याचा नाश होत नाही.३३. पंचभूतांच्या या देहांत जीवाचा अनुप्रवेश झाल्यावर होणाऱ्या पती, पिता आदि भावना वेदांच्या कोणत्याही प्रमाणांना धरून नाहीत. लाकडाला आग लागली ती जशी त्याचाच आकार घेते तसा चैतन्याचा अंश असलेला जीव त्या त्या देहासारखा भासतो. कठोपनिषदांत (२:५:९) सांगितल्याप्रमाणे अग्नी ज्या ज्या पदार्थांत प्रवेशतो त्या त्या रूपाचाच होतो. त्याचप्रमाणे हा एकच अंतरात्मा विविध देहांमध्ये प्रवेश करून ती ती रूपे धारण करतो. खरे तर त्या चैतन्याला न रूप आहे न लिंग. तो न स्त्री आहे, न पुरुष, न नपुंसक. जे जे शरीर तो धारण करतो त्याचे गुणधर्म त्याच्यावर आरोपित होतात (श्वेताश्वतर उ. ५:१०). अशा त्या प्रकृतीत स्थिरावलेल्या आत्म्याला अज्ञानी लोक हा 'माझा पती, हा माझा पिता, हा माझा पुत्र' इत्यादि म्हणतात.३४.

**प्राप्तः प्रकृत्युत्थगुणानुगोऽसौ शरीरतादात्म्यमतोऽस्य वृद्धा ।**
**द्वन्द्वप्रतीतिर्न तु सामलेऽजे द्वन्द्वोत्थकर्माश्रयिणो भवोऽस्ति ।।३५।।**
**भवोद्भवः कर्मत एव कर्म भवोद्भवं तूभयमज्ञभावात् ।**
**धीरेण येनोभयमेव कृत्तं तत्त्वासिना तस्य न वै भ्रमोऽयम् ।।३६।।**

प्रकृति+उत्थ+गुण+ अनुगः असौ शरीर+तादात्म्यं प्राप्तः। अतो अस्य द्वन्द्व+प्रतीतिः वृद्धा। सा तु अमले अजे न। भवः द्वन्द्व+उत्थ+ कर्म+आश्रयिणः अस्ति।३५। कर्मतः एव भव+उद्भवः, कर्म भव+उद्भवं, उभयं तु अज्ञभावात्। येन धीरेण उभयं एव तत्त्व+असिना कृत्तं तस्य अयं भ्रमः न वै।३६।

प्रकृतीतून उद्भवलेल्या गुणांना अनुसरल्याने हा जीव शरीराशी तादात्म्य पावतो. आपण हे शरीरच आहो अशा मोहांत पडतो. त्यामुळे आपण स्त्री आहो किंवा पुरुष आहो इत्यादि कल्पनांनी सुख-दुःखादि द्वंद्वाचा अनुभव घेतो. ही द्वंद्वप्रतीती शुद्ध, निर्विकार आत्मस्वरूपांत नसते. ह्या द्वंद्वाच्या प्रतीतीतून कर्मे घडतात आणि तीच ह्या जन्ममरणरूपी संसाराचा आश्रय आहेत.३५. असे जर आहे तर कुणी एक देवदत्त जन्मला तर त्याचे यथाशास्त्र जातक करावे अशी लोकांची आणि शास्त्राचीही मान्यता कां आहे? पूर्वजन्माच्या कर्मापासूनच भवाचा म्हणजे देहाचा उद्भव होतो; तसेच त्या देहाने केलेले कर्म (क्रियमाण) हेच पुढच्या जन्माला कारण होते; अशा परस्पर कार्यकारणभावाने जुडलेले देह आणि कर्म ह्या दोन्हींच्या मुळाशी अज्ञान हेच कारण आहे. ब्रह्मसूत्रांतील दोन अधिकरणानी (२.३.१७-१८) हा विषय स्पष्ट केला आहे. स्थावर अथवा जंगम यांच्या संदर्भांत जन्म-मरण हे शब्द शरीराच्या उत्पत्ती आणि लयाला उद्देशून वापरलेले आहेत. जातकर्मविधान हेसुद्धा देहाच्या उत्पत्तीला अनुलक्षून आहे. त्याला जन्म ही केवळ संज्ञा दिली आहे. पुढच्याच सूत्रांत सांगितले आहे की, जीवात्मा कधीच जन्मत नाही कारण तशा अर्थाची श्रुति नाही; उलट त्याच्या नित्यत्वाचे, अजत्वाचे, अविकारित्वाचे प्रतिपादन करणाऱ्या अनेक श्रुति आहेत. वेगळ्या शब्दांत असे म्हणतां येईल की उपाधींचा जन्म हाच जन्म आहे आणि उपाधींचा नाश हेच मरण आहेत, त्यांचा जीवात्म्याशी कांही संबंध नाही. जन्म आणि कर्म ह्या दोन्हींचा छेद जो तत्त्वज्ञानरूपी खड्गाने करतो तो या जन्ममरणरूपी भ्रमांतून सुटतो.३६.

**अस्यास्त्यविद्यैव घटादिवद्द्यो रुपाधिरात्मत्वमुपाध्यपाये ।**
**मालाहिवत्कल्पित एति नाशं भ्रमोऽस्य सद्दर्शिततत्त्वदीपात् ।।३७।।**

द्योः घटादिवत् अस्य अविद्या उपाधिः अस्ति। उ पाधि+अपाये आत्मत्वम्। सत्+दर्शित+तत्त्व+दीपात् अस्य भ्रमः कल्पित माला+अहिवत् नाशं एति।'३७।

जन्म-मरणाला कारण ही उपाधी कोण आहे? आकाशाला जशा घट, मठ आदि उपाधी असतात, ज्यामुळे आकाश सीमित झाल्यासारखे वाटते, तशाच आत्म्याला परिच्छिन्न भासवणाऱ्या देहादि उपाधी आहेत. घट-मठादि उपाधींचा नाश झाला तरी आकाश जसेच्या तसेच राहते. त्याचप्रमाणे देहादि उपाधींचा नाश झाला तरी निर्विकल्प आत्मस्वरूप निर्बाधच राहते. श्वेताश्वतर उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (६:११) सर्व भूतमात्रांत एकच अंतरात्मा गूढ रूपाने वास करतो; हाच सर्वव्यापी निर्गुण एकमेवाद्वितीय देव सर्वांच्या अंतरांत साक्षित्वाने राहून त्यांच्या कर्माचे नियंत्रण करतो. अविद्येच्या उपाधीने त्याचे विभाजन झाल्यासारखे वाटते आणि तोच ज्ञानमय, मनोमय, प्राणमय इत्यादी स्वरूपांत भासतो; अर्थातच उपाधींचा संबंध सुटल्यावर त्याचे सहज स्वरूपच राहते. बृहदारण्यक उपनिषदांत (४:१५:१३) प्रज्ञानघनाच ह्या भूतांपासून उडून जातो आणि त्या भूतांचा लय होतो असे सांगितले आहे तो उपाधीचाच प्रलय आहे, आत्म्याचा नव्हे.

**ज्ञानदीप -** *सता* म्हणजे संतांनी दाखविलेल्या दिव्याच्या उजेडाने, माळेवर भासणाऱ्या सर्पासारखा, ह्याचा अनादिकालासून प्रतीत झालेला भ्रम नष्ट होतो. '*सता*'चा अर्थ असाही घेता येईल की आपल्या भक्तांच्या अंतःकरणातील सत्यज्ञानानन्त इत्यादि लक्षणाच्या ईश्वराने आपल्या भक्तावरील अतीव करुणेने दर्शविलेला, भक्तीच्या तेलाने भिजवलेली ब्रह्मचर्यादि साधनांच्या संस्कारलेली बुद्धी हीच ज्याची वात, भगवद्भावाच्या अभिनिवेशाच्या वायूने प्रेरलेला, विषयांच्या वाऱ्यापासून रक्षिलेल्या, आणि म्हणून रागद्वेषादि काजळी नसलेल्या चित्तांत ठेवलेल्या विवेकप्रत्ययरूप अशा ज्ञानदीपाच्या, नित्य अभ्यासाने एकाग्र ध्यानाने झालेल्या सम्यक् दर्शनरूपी प्रकाशाने, अज्ञानापासून उद्भवलेला मिथ्याप्रत्ययरूपी मोहांधःकार नाहीसा होतो. '*तेषामेवानुकंपार्थं अहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता।।*' भ.गीता १०-११।।३७.

**तावद्भ्रमान्तौ नियतौ द्युरात्रिवज्जन्तोरतस्तत्त्वविचारवान्भवेत् ।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयात्मशोकतः स्वार्थः कुतः साध्वि समुद्भवेद्वद ।।३८।।**
**तस्माच्छुचं मुञ्च सति प्रसाधय स्वार्थं यथा येन भवं तरिष्यसि ।**
**तत्काल एषैव यदा प्रमादतो याता नृयोनिस्तु पुनर्न तत्कथा ।।३९।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**प्राप्ता धवानामयहेतुनाधुना दैवात्पथेऽस्मिन्दयितो मृतः पितः ।**
**सम्बन्धिनोऽप्यन्तरितास्त्वमेव मे सर्वोऽसि मामुद्धर दुःखसागरात् ।।४०।।**

तावत् जन्तोः भ्रम+अंतौ द्यु+रात्रिवत् नियतौ। अतः तत्त्व+विचारवान् भवेत्। (हे) साध्वि, त्वक्+रक्त+मांस+अस्थि+मय+आत्म+शोकतः कुतः स्वार्थः समुद्भवेत्?३८। तस्मात् (हे) सति, शुचं मुञ्च। स्वार्थं प्रसादय, येन यथा भवं तरिष्यसि। एष एव तत् कालः। यदा प्रमादतो नृ+योनिः याता तु पुनः तत्+कथा न।३९। साध्वी उवाच। धव+अनामय+हेतुना प्राप्ता। दैवात् अस्मिन् पथे दयितः मृतः। पितः सम्बन्धिनः अपि अन्तरिता। त्वं एव मे सर्वः असि। मां दुःख+सागरात् उद्धर।४०।

'तत्त्वज्ञानदीपाने अज्ञानतमाचा नाश होईपर्यंत जीवाला हे जन्मरूपी भ्रम आणि उपाधिनाशरूपी मरण ही दिवस आणि रात्र यांप्रमाणे ठरलेले आहेत. तेवढ्यासाठी विचार-विवेक केला पाहिजे. त्वचा, मांस, रक्त, अस्थी इत्यादींच्या बनलेल्या शरीरासंबंधी शोक करत राहण्याने खरा स्वार्थ - मनुष्यजन्माचे ध्येय जो मोक्ष, तो कसा सिद्ध होणार?३८. याकरिता हे सती, हा शोक आवर आणि पारलौकिक स्वार्थ साध. त्यानेच तू हा भवसागर तरशील. हीच ती वेळ आहे. जोपर्यंत वार्धक्याने इंद्रिये दुर्बल होत नाहीत, शरीर परावलंबी होत नाही तोपर्यंतच हा प्रयत्न करायला हवा. एकदा हा मानव जन्म प्रमादाने हातातून निसटला की पुनः त्याची वार्ताही दुर्लभ होईल.'३९. ती सती म्हणाली, 'माझ्या पतीला आरोग्य व्हावे म्हणून मी दुरून इथे आले आहे. दुर्दैवाने इथे वाटेतच माझ्या पतीला मृत्यू आला. वडीलधारे व इतर संबंधीही दुरावले. आता आपणच माझे सर्व कांही आहात. ह्या दुःखसागरातून मला वर काढा! माझा उद्धार करा' हे सतीच्या मुखांतील शब्द गुरूपसत्तीचे निदर्शक आहेत.४०.

### ।। साधुरुवाच ।।

**भर्तैव तारकं साध्व्या नोपाया बहवो नृवत् । शृण्वगस्त्यसतीस्तोत्र-प्रसङ्गोक्तं वृषं सुरैः ।।४१।।**
**विन्ध्योत्कर्षभियैत्य तद्गुरुमगस्त्यं तद्वधूं निर्जरैः । साकं देवगुरुर्जगौ सति रमा सावित्र्युमारुन्धती ।।**
**इत्याद्या अपि साध्व्य उत्तमतमा तासां त्वमेवास्यहो। छायेवानिशमीशसेवनपरा त्वन्निघ्नमेतज्जगत् ।।४२।।**
**भक्त्या छायेव याश्रान्तं स्वभर्तृपरिचारिणी । पतिरेव व्रतं यस्या अखण्डं सा पतिव्रता ।।४३।।**

साधुः उवाच। 'साध्व्या भर्ता एव तारकः। नृवत् बहवः उपायाः न। सुरैः अगस्त्य+सती+स्तोत्र+प्रसङ्ग+उक्तं वृषं शृणु।'४१। विन्ध्य+उत्कर्ष+भिया तत्+गुरुं अगस्त्यं निर्जरैः साकं एत्य देवगुरुः तत्+वधूं जगौ। '(हे) सति, रमा, सावित्री, उमा, अरुन्धती इत्याद्या साध्व्यः। तासां त्वं एव छाया इव अनिशं ईश+सेवन+परा उत्तमतमा असि। एतत् जगत् त्वत्+निघ्नम्।४२। या भक्त्या छाया इव अश्रान्तं स्व+भर्तृ+परिचारिणी, यस्या पतिः एव अखण्डं व्रतं, सा पतिव्रता।४३।

तेव्हां तो साधू उत्तरला, 'स्त्रियांना पती हाच एकमेव तारक (तारकः) आहे. पुरुषांप्रमाणे त्यांच्यासाठी अनेक उपाय नाहीत. देवांनी अगस्तीची पत्नी लोपामुद्रा हिचे स्तवन करताना प्रसंगाने सांगितलेला (स्त्रियांचा) धर्म मी तुला सांगतो. ऐक.' *'भर्तैव ता रकं'* असा पाठ घेतला तर भर्ता हाच हृदयस्थ तारक ब्रह्म आहे असा अर्थ लावावा.४१. स्कंद पुराणातील कथा आहे. मेरु पर्वताच्या ईर्षेने विंध्य पर्वत आपली उंची वाढवू लागला. वाढत वाढत तो सूर्यमंडलासमोरून स्वर्गभुवनाच्या वर गेला. त्यामुळे त्याच्या दक्षिणेला सूर्यकिरण पोचेनात. अर्थात सर्व यज्ञादिकर्मांचा लोप होऊ लागला. तेव्हा विंध्य पर्वताला नमविण्यासाठी त्याचे गुरू अगस्ती ऋषी यांच्याकडे सर्व देवांसह बृहस्पती गेले. त्या वेळी अगस्तींची पत्नी लोपामुद्रा हिची स्तुती करतांना देवगुरू बृहस्पतींनी स्त्रियांचे धर्म सांगितले. ते म्हणाले, 'हे सती लोपामुद्रे, लक्ष्मी, सावित्री, पार्वती, अरुन्धती इत्यादि महान साध्वी आहेत. पण सावलीसारखी पतीची निरंतर सेवा करणारी तूच सर्व पतिव्रतात श्रेष्ठतम आहेस. जी भक्तिभावाने आपल्या पतीची सावलीसारखी अथक सेवा करते आणि पती हेच जिचे अखंड व्रत आहे ती पतिव्रता.'४३.

**पादाम्बु तीर्थमुच्छिष्टं प्रसादो देवतार्चनम् । तत्सेवा भूषणं तोषो धर्मोऽनुज्ञानुपालनम् ।।४४।।**
**वशानुवर्तनं देह-यात्रा श्वश्र्वादिगौरवम् । लोकयात्रेश्वरो भर्ता करणं पोष्यपोषणम् ।।४५।।**
**कार्यं नाज्ञां विना किञ्चिद् दूरात्स्थेयं स्थिते प्रिये । सुप्तोत्थितात्प्रागुत्थाय सेव्योऽश्रान्तं पतिर्मुदा ।।४६।।**
**तस्मै दत्वेष्टमाप्लुत्य गृहसंमार्जिनादिकम् । दत्वेशायेष्टसंभारा देयाः स्वादु च भोजनम् ।।४७।।**
**क्रुद्धश्चेत्प्रार्थनीयो न गन्तव्यं परसद्मनि । नाज्ञां विना गुरोर्गेहे न वक्तव्यं सदेतरैः ।।४८।।**

पाद+अम्बु तीर्थं, उच्छिष्टं प्रसादो, तत्+सेवा देवता+अर्चनं, तोषो भूषणं, अनुज्ञा+अनुपालनं धर्मः।४४। वश+अनुवर्तनं देहयात्रा, श्वश्रू+आदि+गौरवं लोकयात्रा, भर्ता ईश्वरो, पोष्य+पोषणं करणम्।४५। आज्ञां विना किञ्चित् (अपि) न कार्यम्। प्रिये स्थिते दूरात् स्थेयम्। सुप्त+उत्थितात् प्राक् उत्थाय पतिः अश्रान्तं मुदा सेव्यः।४६। तस्मै इष्टं दत्वा आप्लुत्य गृह+संमार्जन+आदिकम्। ईशाय इष्ट+संभारा, स्वादु भोजनं च देयाः। ४७। क्रुद्धः चेत् प्रार्थनीयः। परसद्मनि न गन्तव्यम्। आज्ञां विना गुरोः गेहे न (गन्तव्यम्)। सदा इतरैः न वक्तव्यम्।४८।

आपल्या पतीच्या पायावरचे पाणी हेच तीर्थ, त्याचे उच्छिष्ट हाच प्रसाद, त्याची सेवा हीच देवपूजा, त्याचा संतोष हाच अलंकार आणि त्याच्या आज्ञेचे पालन हाच धर्म जाणावा.४४. पतीच्या मर्जीनुसार वागणे हीच तिची देहयात्रा आहे तर सासू-सासरे इत्यादींचा मान ठेवणे हीच तिची लोकयात्रा आहे. पती हाच तिचा परमेश्वर आहे. लहान-थोर सर्व पोष्य कुटुंबियांचे पोषण हे तिचे कर्तव्य आहे.४५. पतीच्या आज्ञेवाचून कांहीही करू नये. पती उभा असेल तर आपण मर्यादेने थोडे अंतर ठेवून उभे राहावे. पती झोपून उठायच्या आत आपण उठावे आणि आनंदाने अविश्रांत पतीची सेवा करावी.४६. पतीला हवे ते देऊन स्नानादि करावे आणि घराचा स्नान-सडा करावा. पतीला पूजादिकांसाठी पाणी, फुले इत्यादि इष्ट ती सामुग्री देऊन त्याला रुचकर भोजन द्यावे.४७. पती रागावले तर त्याची विनवणी करावी. दुसऱ्यांच्या घरी जाऊ नये. पतीच्या परवानगीशिवाय आपल्या माहेरी जाऊ नये. सारखे विनाकारण दुसऱ्यांशी बोलू नये.४८.

**मन्दं श्वश्र्वादिसामीप्ये वक्तव्यं सन्धयेशितुः । इष्टं देहीति नो वाच्यं वक्तव्यं परवक्त्रतः ।।४९।।**
**स्वीकार्यं वस्त्रभूषादि भर्त्रा दत्तं यदृच्छया । न निन्द्यो दुर्भगो दीनो दुःशीलोऽपि शिवोपमः ।।५०।।**
**न कार्यं स्वैरिणीसख्यं स्वानां पार्थक्यमप्युत । धार्याः सौभाग्योपचारा न भूषाः प्रोषिते प्रिये ।।५१।।**
**दर्शितव्यं मुखं नर्तौ श्रोतव्यं नागमादिकम् । स्नात्वा चतुर्थेऽह्नि भर्ता प्रेक्ष्यो वाऽसम्भवे रविः ।।५२।।**
**प्रोषितेऽर्च्याज्ञया स्थेयं प्रत्युद्गन्तव्यमागते । सव्रीडहावरत्यङ्घ्रि-सेवाद्यैस्तोषणीय इत् ।।५३।।**

श्वश्रू+आदि+सामीप्ये मन्दं वक्तव्यम्। ईशितुः सन्धया (वक्तव्यम्)। इष्टं देहि इति नो वाच्यम्। पर+वक्त्रतः वक्तव्यम्।'४९। 'भर्त्रा यदृच्छया दत्तं वस्त्र+भूषा+आदि स्वीकार्यम्। न निन्द्यः। दुर्भगः, दानः, दुःशीलः अपि शिव+उपमः।५०। स्वैरिणी+सख्यं न कार्यम्। स्वानां पार्थक्यं अपि। सौभाग्य+उपचाराः धार्याः। प्रिये प्रोषिते भूषाः न (धार्याः)।५१। ऋतौ मुखं न दर्शितव्यं, आगमादिकं न श्राव्यम्। चतुर्थे अह्नि स्नात्वा भर्ता प्रेक्ष्यः। वा असम्भवे रविः (प्रेक्ष्यः)।५२। प्रोषिते अर्च्य+आज्ञया स्थेयम्। आगते प्रत्युद्गन्तव्यम्। स+व्रीड+हाव+रति+अङ्घ्रि+सेवाद्यैः तोषणीयः इत्।५३।

सासू-सासरे इत्यादी वडीलधाऱ्यांशी नम्रतेने आणि हळू बोलावे. पतीशीही मर्यादेने बोलावे. आपल्याला 'अमुक पाहिजे' असे न म्हणता इतरांच्या (पुत्र-कन्या आदि) तोंडून त्यांच्या कानांवर घालावे.४९. पतीने स्वेच्छेने दिलेली वस्त्रे, अलंकार स्वीकारावे. त्याची निंदा करू नये. भाग्यहीन, दरिद्री आणि दुःशील जरी असला तरी तो शिवासमान पूज्य मानावा.५०. स्वैराचारी स्त्रियांशी मैत्री करू नये. आपल्या सासरच्या लोकापासून वेगळे होऊ नये. हळदी, कुंकू, काजळ, शेंदूर आणि लेणी (मंगळसूत्र इत्यादि) हे सौभाग्य उपचार धारण करावेत. पती गावाला किंवा परदेशाला गेल्यावर अलंकार वर्ज्य करावेत.५१. ऋतुकाळी तोंड दाखवू नये, वेदादिक ऐकू नयेत. चौथ्या दिवशी स्नान करून पतीचे तोंड पाहावे. ते शक्य नसेल तर सूर्याचे दर्शन घ्यावे.५२. पती दूर गांवाला गेल्यावर सासू-सासरे इत्यादि वडीलधाऱ्यांच्या आज्ञेने राहावे. पती बाहेरून आल्यावर सामोरे जावे. लज्जा, हावभाव, संभोग, पाय चुरणे इत्यादींनी त्याला संतोषवावे.५३.

**सुप्तेऽस्मिन्च्छयनं कार्यं नोच्चार्यं पतिनाम च । भोक्तुं नान्यत्र गन्तव्यं याच्ञा कार्या न कुत्रचित् ।।५४।।**
**वैषम्येऽपि सुखं कल्प्यं कल्प्येशे दुःखिते न मुत् । त्याज्यमुच्चासनं लीला धवाद्यग्रे हसस्तथा ।।५५।।**
**प्रतिवादाच्छुनी भर्तुरुलूकी गुरुवर्जनात् । पतिं विना स्वादुभुक्त्या वराहोलूकयोनिगा ।।५६।।**
**मूका रोषोक्त्या व्याघ्री स्यात् कृतताडनभाषिणी । सपत्नीवैरतः स्त्री स्याद् दुर्भगा जारगा कृमिः ।।५७।।**
**पत्यौ मृतेऽनुगन्तव्यं स्थेयं वा विधवावृषे । शवाभावे गर्भिणीत्वेऽल्पेऽर्भे वैधव्यपालनम् ।।५८।।**

अस्मिन् सुप्ते शयनं कार्यम्। पति+नाम न उच्चार्यम्। भोक्तुं अन्यत्र न गन्तव्यम्। कुत्रचित् याच्ञा न कार्या।५४। वैषम्ये अपि सुखं कल्प्यम्। ईशे दुःखिते मुत् कल्प्यः। धवादि अग्रे उच्च+आसनं, लीला तथा हसः त्याज्यम्।५५। भर्तुः प्रतिवादात् शुनी, गुरु+वर्जनात् उलूकी, पतिं विना स्वादु+भुक्त्या वराह+उलूक+योनिगा।५६। रोषोक्त्या मूका, कृत+ताडन+भाषिणी व्याघ्री स्यात्। सपत्नी+वैरतः स्त्री दुर्भगा स्यात्। जारगा कृमिः।५७। पत्यौ मृते अनुगन्तव्यं वा विधवा+वृषे स्थेयम्। शव+अभावे, गर्भिणित्वे, अल्पे अर्भे वैधव्य+पालनम्।५८।

दारिद्र्यादि विषम काळातही सुख मानावे; मन प्रसन्न ठेवावे. पती दुःखात असेल तर आपण आनंद मानू नये. पती, सासू, सासरे इत्यादींच्या समोर उच्च आसनावर बसू नये, खेळू नये किंवा मोठ्याने हसू नये.५४. पतीला झोप लागल्यावर आपण झोपावे. पतीच्या नावाचा उच्चार करू नये. जेवणासाठी इतरांच्या घरी जाऊ नये. कुणाजवळही याचना करू नये.५५. नवऱ्याला उलट उत्तरे देणारी कुत्र्याच्या जन्माला जाते. सासू-सासऱ्यांची वंचना करणारी जन्मांतरी घुबडी होते. पतीला सोडून गोड खाणारी डुकराच्या किंवा घुबडाच्या जन्माला जाते.५६. पतीला रागाने बोलणारी जन्मांतरी मुकी होते. 'मला पतीने मारले' अशी चहाडी करणारी वाघीण होते. सवतीशी वैर करणारी दरिद्री होते. जारकर्म करणारी किड्याच्या जन्माला जाते.५७. पतीच्या मृत्यूनंतर सहगमन करावे किंवा विधवाधर्माने राहावे. विशेषतः पतीचे शव मिळत नसेल, किंवा स्त्री गरोदर असेल वा तिचे लहान मूल असेल तर सहगमन न करता विधवाधर्माचे पालन करावे.५८.

**शिरसो वपनं कार्यं भुवि शय्या सकृद्भुजिः । वर्ज्यास्ताम्बूलगन्धादि सुभोगा मंगलाप्लुतिः ।।५९।।**
**त्याज्याः सौभाग्योपचारा धार्यं गौरांशुकं सदा । राधमाघोर्जेषु कार्यं स्नानदानव्रतादिकम् ।।६०।।**
**शक्तौ चान्द्रायणं कार्यं भोज्यं वाज्यफलादिकम्। यत्प्रियं सति पत्यौ तद्देयं विप्राय भक्तितः ।।६१।।**
**मासव्रतं च कल्पोक्तं कार्यं यद्यत्तु वर्जितम् । देयं विप्राय चोष्णाम्बु तोषणीयस्तु तैर्थिकः ।।६२।।**

शिरसः वपनं कार्यं, भुवि शय्या, सकृत् भुजिः। ताम्बूल+गन्धादि, सुभोगा, मंगल+आप्लुतिः वर्ज्याः।५९। सौभाग्य+उपचाराः त्याज्याः। सदा गौर+अंशुकं धार्यम्। राध+माघ+ऊर्जेषु स्नान+दान+व्रतादिकं कार्यम्।६०। शक्तौ चान्द्रायणं कार्यम्। वा आज्य+फल+आदिकं भोज्यम्। पत्यौ यत् प्रियं सति तत् विप्राय भक्तितः देयम्।६१। कल्प+उक्तं मास+व्रतं च कार्यम्। यत् यत् तु वर्जितं उष्ण+अम्बु च विप्राय देयम्। तैर्थिकः तोषणीयः।६२।

**विधवाधर्मा**चे निरूपण करतात. डोक्यावरचे केस काढावेत. जमिनीवर झोपावे. रोज एक वेळच जेवावे. विडा, गंध, पुष्प इत्यादि छानछौकीच्या वस्तू सोडाव्या. मंगलस्नान करू नये.५९. हळदी-कुंकू इत्यादि सौभाग्य चिह्नांचा त्याग करावा. नेहमी पांढरे किंवा लाल वस्त्र नेसावे. वैशाख, माघ आणि कार्तिक या महिन्यांत स्नान, दान, व्रत इत्यादींचे आचरण करावे.६०. शक्ती असेल तर चांद्रायण करावे; किंवा तूप, फळे इत्यादींवर राहावे. पती असतांना जे पदार्थ आपल्या आवडीचे असतील ते ब्राह्मणाला भक्तीपूर्वक दान करावे.६१. कल्पांत (शास्त्रांत) सांगितलेले मासाचे व्रत विशिष्ट पदार्थ सोडणे, थंड पाण्याने स्नान करणे इत्यादि, आचरावे. जे जे आपण सोडलेले ते ते पदार्थ ब्राह्मणाला दान करावे. तसेच ब्राह्मणाला ऊन पाणी द्यावे. तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांना दानादिकांनी संतुष्टवावे.६२.

**पुत्रे तदाज्ञया स्थेयं सम्पूज्यः पतिवद्धरिः । गुरुगोऽतिथिसद्विप्राः पूज्यास्त्याज्यं कुभोजनम् ।।६३।।**
**हरिलीलारतिः कार्याऽपुत्रया पितृतर्पणम् । गोप्यं शीलं स्वकैः सार्धं तद्वैगुण्यादधोगतिः ।।६४।।**
**एतद्धर्माश्रयात्साध्वी दुर्गतिस्थमपि प्रियम् । प्रसह्योद्धृत्य चिल्लीव सर्पं स्वर्विशति ध्रुवम् ।।६५।।**
**लोपामुद्रे त्वत्ततोऽसौ सतीधर्मोऽत्र तारकः । एवं जीवोक्तधर्मस्ते मयोक्तः स्वेच्छयाचर ।।६६।।**

पुत्रे (सति) तत्+आज्ञया स्थेयम्। हरिः पतिवत् पूज्यः। गुरु+गो+अतिथि+सत्+विप्राः पूज्याः। कुभोजनं त्याज्यम्।६३। हरि+लीला+रतिः कार्या। अपुत्रया पितृ+तर्पणम् (कार्यम्)। शीलं गोप्यम्। तत्+वैगुण्यात् स्वकैः सार्धं अधोगतिः।६४। एतत्+धर्म+आश्रयात् साध्वी दुर्गतिस्थं अपि प्रियं चिल्ली सर्पं इव प्रसह्य उद्धृत्य ध्रुवं स्वः विशति।६५। (हे) लोपामुद्रे, त्वत्+ततः असौ सती+धर्मः तारकः। एवं जीव+उक्त+धर्मः मया उक्तः। स्व+इच्छया आचर।६६।

मुलगा असेल तर त्याच्या आज्ञेत राहावे. विष्णूची पतीभावाने पूजा करावी. गुरू, गोमाता, अतिथी आणि योग्य ब्राह्मण यांची पूजा करावी. कांदा, लसूण इत्यादि निषिद्ध पदार्थ खाऊ नयेत. कारण मनुस्मृतीनुसार (११:५६) ते सुरापानासमान आहेत. (*ब्रह्मोझ्झं वेदनिन्दां च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः। गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट्।।*)६३. भगवंताच्या लीलांचे भक्तिपूर्वक श्रवण करावे. पुत्र नसेल तर पत्यादि त्रयी आणि पित्रादि त्रयींना उद्देशून तर्पण करावे. शीलाचे संरक्षण करावे. त्यांत वैगुण्य आले तर पूर्वजांसह आपण अधोगतीला जातो.६४. ह्या विधवाधर्माच्या आश्रय घेणारी साध्वी, पती नरकांत जरी असला तरी, घारीने सर्पाला ओढून आकाशांत न्यावे तसे त्याला तेथून बळाने खेचून काढून दीर्घकाल स्वर्गाला घेऊन जाते.६५. हा धर्म सांगून झाल्यावर बृहस्पती म्हणाले, 'लोपामुद्रे, तुझ्यासारख्या सतींपासून विस्तारलेला हा पतिव्रताधर्म खरोखर तारक आहे.' श्रीगुरू म्हणतात, 'बृहस्पतींनी प्रतिपादलेला हा धर्म मी तुला सांगितला. आतां तू तुला जे रुचेल तेच कर. पतीच्या मृत्यूनंतर जी नारी ब्रह्मचर्याचे पालन करते ती जरी निपुत्रिक असली तरी मनुस्मृतीत (५:१६०) तिला ब्रह्मचाऱ्यांप्रमाणे स्वर्गवासाचे फळ सांगितले आहे.' (*मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यं व्यवस्थिता। स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः।।*)६६.

**भेवार्कं पतिमन्वेहि रोचतेऽनुगमो यदि । स्वर्याति गौरवाद्येन प्रोद्धृत्येशं यमादपि ।।६७।।**
**प्रत्यङ्घ्र्यश्वक्रतुफलं कोट्यब्दं प्रतिरोमतः । स्वर्वासः सार्धत्रिकोटि-रोमहोमात्प्रियान्वितः ।।६८।।**
**रूपलावण्यसंपन्नाः स्त्रियः सन्ति गृहे गृहे । ताभिः किं कार्यमेकैव साध्वी त्रिकुलपावनी ।।६९।।**
**क्ष्मावातोऽर्कोऽग्निर्बिभेति स्वत्रासोऽस्या भवेदिति । तिष्ठन्ति प्रणता देवाः स्वपदच्युतिशङ्कया ।।७०।।**

यदि अनुगमः रोचते, अर्कं भा इव पतिं अन्वेहि। येन यमात् अपि ईशं प्रोद्धृत्य गौरवात् स्वः याति।६७। प्रति+अंघ्रि अश्वक्रतु+फलं, सार्धत्रिकोटि+रोम+होमात् प्रतिरोमतः प्रिया अन्वितः कोटि+अब्दं स्वः+वासः।६८। रूप+लावण्य+संपन्नाः स्त्रियः गृहे गृहे सन्ति। ताभिः किं कार्यम्? एक एव साध्वी त्रि+कुल+पावनी।६९। अस्याः स्व+त्रासः भवेत् इति क्ष्मा+वातः+अर्कः+अग्निः बिभेति। देवाः स्व+पद+च्युति+शंकया प्रणताः तिष्ठन्ति।७०।

'तुला जर सहगमनाची आवड असली तर, सूर्यासह जशी त्याची प्रभा जाते तशी तू पतीसह जा. त्यायोगे तू पतीला यमापासूनही बळाने खेचून, देवादिकांनी केलेल्या सत्कारपूर्वक स्वर्गांत जाशील.'६७. 'सहगमन करणारी स्त्री प्रत्येक पावलागणिक एकेका अश्वमेधाचे पुण्य मिळवीत असते. सती आपल्या शरीराच्या साडेतीन कोटी रोमांची आहुती देते. त्या प्रत्येक रोमासाठी एक ती एकेक कोटी वर्षे पतीसह स्वर्गांत वास करते.६८. सौंदर्य आणि लावण्य मिरविणाऱ्या स्त्रिया काय घरोघरी आहेत. त्यांना घेऊन काय करायचे? एक जरी पतिव्रता सती असली तरी ती पित्याच्या, मातेच्या आणि पतीच्या अशा तीन कुळांना पावन करते.६९. 'ह्या पतिव्रतेला आपल्यामुळे कष्ट तर होणार नाहीत ना?' अशा शंकेने पृथ्वी, वायू, सूर्य आणि अग्नी हे धास्तावलेले असतात. सर्वही देव तिने आपल्याला पदापासून काढू नये म्हणून हात जोडून नम्रतेने उभे असतात.७०.

**साध्व्या इयान्प्रभावोऽस्ति धन्यैषा पितृतारका । धिग्दुःशीलामधःशेते या चिरं त्रिकुलैः समम् ।।७१।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**वैधव्यपालनं कष्टं तारुण्याद्यत्र घातकम् । प्रीतिर्धवानुगमने नूनं मे वर्धते गुरो ।।७२।।**

**।। साधुरुवाच ।।**

**साधु साध्वि तदिष्टं ते मा शुचो दैवमुन्नतम् । आयुष्मद्भीष्मपौलस्त्य-मुखाः कालवशं गताः ।।७३।।**
**कालोऽजय्योऽमरैश्चापि दुर्धरः सद्गुरुं विना । गुरुदर्शनकामाप्ता दूरात् तत् त्वं समाचर ।।७४।।**

'साध्व्या इयान् प्रभावः अस्ति। एषा पितृतारका धन्या। या त्रिकुलैः समं चिरं अधः शेते (तां) दुःशीलां धिक्।७१। साध्वी उवाच। वैधव्य+पालनं कष्टम्। अत्र तारुण्य आदि घातकम्। (हे) गुरो मे धव+अनुगमने प्रीतिः वर्धते।७२। साधुः उवाच। 'साधु! (हे) साध्वि तत् ते इष्टम्। मा शुचः। दैवं उन्नतम्। आयुष्+मत्+भीष्म+ पौलस्त्य+मुखाः कालवशं गताः।'७३। 'कालः अमरैः अपि अजय्यः। सद्गुरुं विना दुर्धरः। त्वं दूरात् गुरु+दर्शन+काम+आप्ता। तत् समाचर।७४।

'एवढा साध्वीचा प्रभाव असतो. सर्व पितर तारणारी ती पतिव्रता खरोखरच धन्य होय. तिच्या उलट तिन्ही कुळांना दीर्घ नरकवासाला घेऊन जाणाऱ्या दुर्वर्तनी स्त्रीचा धिक्कार करावा तेवढा थोडाच आहे.'७१. त्या तापसाचे बोलणे ऐकून ती साध्वी म्हणाली, 'विधवेच्या धर्माचे आचरण फारच कष्टप्रद वाटते. शिवाय माझे तारुण्यादि माझ्या घाताला कारण होण्याची भीती वाटते. गुरुमहाराज, हा सर्व विचार करून मला पतीच्या मागे सहगमन करण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे.'७२. साधू म्हणाले, 'छान बोललीस! तेच तुझ्या कल्याणाचे आहे. शोक करू नकोस. दीर्घायुषी म्हणविलेले भीष्म आणि रावण आदिसुद्धा मृत्यूचे ग्रास झालेच ना?७३. काळ हा देवादिकांनासुद्धा अजिंक्य आहे. सद्गुरूंवाचून त्याचा सामना करणे अशक्य आहे. तू लांबून श्रीगुरुदर्शनाच्या इच्छेने आली आहेस तर ते तू कर.'७४.

**स्नात्वा पीताम्बरं धृत्वा प्रायश्चित्तपुरःसरम् । सौभाग्यवायनान्यङ्ग सपत्नीकद्विजेभ्य इत् ।।७५।।**
**दत्वा श्रुत्योर्गले चेमान् बध्वाक्षान्भस्म मस्तके । लिप्त्वाङ्गं गुरुपादाद्भिः प्रोक्ष्येशमनुयाह्यिय ।।७६।।**
**इत्युक्त्वा भस्मरुद्राक्षान् दत्वागात्सोऽपि सा द्विजान् । आहूयादात्सुसौभाग्य-दानानि बहुशो मुदा ।।७७।।**
**प्राहानुगान्यात गृहमुमेशौ पितरौ मम । यास्ये तत्रात्र हर्षात्स्वरिति वाच्यं गुरून्प्रति ।।७८।।**
**इत्युक्त्वा नीयमानस्य पत्युरग्निकराग्रतः । गच्छन्ती मन्थरोमेव रेजे मुद्रूपिणी सती ।।७९।।**

'(हे) अङ्ग, स्नात्वा, पीताम्बरं धृत्वा सपत्नीक+द्विजेभ्यः सौभाग्य+वायनानि दत्वा,।७५। इमान् अक्षान् श्रुत्योः गले च बध्वा, मस्तके भस्म लिप्त्वा, ईशं गुरु+पाद+अद्भिः प्रोक्ष्य अनुयाह्यहि।७६। इति उक्त्वा भस्म+रुद्राक्षान् दत्वा सः अगात्। सा अपि द्विजान् आहूय मुदा बहुशः सौभाग्य+दानानि अदात्।७७। अनुगान् प्राह, गृहं यात। उमा+ईशौ मम पितरौ, तत्र यास्ये। अत्र हर्षात् स्वः इति गूरून् प्रति वाच्यम्।७८। इति उक्त्वा नीयमानस्य पत्युः अग्रतः अग्निकरा मन्थरा गच्छन्ति सती उमा इव रेजे।७९।

'बाळे, स्नान करून पीतांबर धारण करून ब्राह्मणांना व सुवासिनींना सौभाग्याची वाणे देऊन,७५. हे रुद्राक्ष पतीच्या कानांत व गळ्यांत बांधून, त्याच्या कपाळावर भस्म लेपून, श्रीगुरूंच्या पायाचे तीर्थ त्याच्यावर शिंपून मग तू सहगमन कर.'७६. असे बोलून आणि भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन तो तापसी आपल्या वाटेने निघून गेला. त्या साध्वीनेही मग ब्राह्मणांना सपत्नीक बोलावून आनंदाने विपुल सौभाग्य वस्तूंचे दान केले.७७. आपल्या सोबत आलेल्या लोकांना तिने बोळवले. म्हणाली, 'गांवाकडे घरी जा. शिव आणि पार्वती हेच माझे मातापिता आहेत. आम्ही त्यांच्याकडे जातो. आम्ही उभयतां इथे आनंदांत आहोत असे माझ्या सासू-सासऱ्यांना सांगा.'७८. असे बोलून स्मशानाकडे चालविलेल्या पतीच्या प्रेतापुढे अग्नी हातांत घेऊन हळूहळू जाणारी ती सती साक्षात् पार्वतीप्रमाणे शोभत होती.७९.

**भर्तृसौख्यानभिज्ञेयं षोडशाब्दातिसुंदरी । कुलोद्धर्त्री सुधन्येति स्तूयमाना जनैर्ययौ ।।८०।।**
**श्मशानमेत्य संस्कृत्य कुण्डेऽग्निं वायनादिभिः । सुवासिनीस्तोषयित्वा सस्मार गुरुभाषितम् ।।८१।।**
**लिप्त्वाङ्गे भस्म बध्वाक्षान् पत्युर्विप्राज्ञया गुरुम् । द्रष्टुकामा ययौ साध्वी संगमं तं स्तुवन्त्यजम् ।।८२।।**
**दाता सर्वेश्वरस्त्वं शरणमपि सतां त्र्यात्मको विश्वसर्ग-**
**स्थित्यन्तानां निदानं ततबिरुदचयः श्रीहरिस्त्वं दयाब्धिः ।**
**मत्तुल्यास्त्वत्कृपांशात्सुपतिसुतसुखाः सन्ति नार्योऽज यास्ये**
**स्वर्भूत्वा पूर्णकामा पतिसुतमुदिता कीर्तिमादाय तेऽद्य ।।८३।।**

भर्तृ+सौख्य+अनभिज्ञा इयं षोडश+अब्दा अतिसुंदरी कुल+उद्धर्त्री सुधन्या इति जनैः स्तूयमाना ययौ।८०। श्मशानं एत्य, कुंडे अग्निं संस्कृत्य, वायनादिभिः सुवासिनीः तोषयित्वा गुरु+भाषितं सस्मार।८१। पत्युः अङ्गे भस्म लिप्त्वा, अक्षान् बध्वा, गुरुं द्रष्टु+कामा साध्वी विप्र+आज्ञया, तं अजं स्तुवन्ति संगमं ययौ।८२। 'त्वं सतां अपि शरणं त्रि+आत्मकः विश्व+सर्ग+स्थिति+अंतानां निदानं सर्वेश्वरः तत+बिरुद+चयः श्रीहरिः दाता दया+अब्धिः। '(हे) अज, मत्+तुल्याः त्वत्+कृपा+अंशात् सुपति+सुत+सुखाः नार्यः सन्ति। अद्य पूर्ण+कामा पति+सुत+मुदिता ते कीर्तिं आदाय स्वः यास्ये।'८३।

'पहा हो ही सोळा वर्षांची सुकुमार सुंदर मुलगी, जिला पतिसुख म्हणजे काय हेसुद्धा ठाउक नाही, सहगमन करून कुळांचा उद्धार करते आहे. ही खरोखर धन्य धन्य आहे,' अशी लोकांची स्तुतिसुमने ऐकत ती जात होती.८०. स्मशानांत येऊन कुंडांतील अग्नीवर संस्कार करून तिने सुवासिनींना वाणे दिली आणि तिला गुरूंचे भाषण आठवले.८१. त्यांनी सांगितल्याप्रमाणे पतीच्या शरीराला भस्म लावून त्याच्या गळ्यात आणि कानांत रुद्राक्ष बांधले आणि सद्गुरूंच्या दर्शनाच्या इच्छेने ब्राह्मणांच्या परवानगीने ती त्या परमात्म्याची स्तुती करीत संगमाकडे निघाली.८२ त्या सतीच्या स्तुतीत सद्गुरूंवर परमेश्वरासारखी निष्ठा आहेच; पण तिचे दुःख, घोर निराशाही आहेत. सर्वसामर्थ्यशाली सद्गुरूंसमोर हे सर्व भाव व्यक्त करतांना तिने उपरोधाचाही अवलंब केला आहे. त्यामुळे ही स्तुती अत्यंत हृदयस्पर्शी झाली आहे.८३.

**मृतो जीवितो रुग्ण आरोग्यमाप्तो गतः शर्म भीतोऽपि दीनोऽर्थयुक्तः ।**
**गतः प्राज्ञतामज्ञ ईश प्रभावात्तवाहं धवाढ्याद्य सायुज्यमेष्ये ।।८४।।**
**एवं स्तुवन्ती पथि साञ्जनाश्रुलीढस्तनस्वर्णघटा हठात्स्वाम् ।**
**उद्धर्तुकामापि समं धवेन जवेन सागत्य हरिं ननाम ।।८५।।**
**आयान्तीं प्रणतां देवस्त्वं सौभाग्यवती भव । अष्टपुत्रा पुनश्चेति भगवान्प्रीत आह ताम् ।।८६।।**

'(हे) ईश, तव प्रभावात् मृतः जीवितः, रुग्णः आरोग्यं आप्तः, भीतः अपि शर्म गतः, दीनः अर्थ+युक्तः, अज्ञः प्राज्ञतां गतः। अद्य धव+आढ्या सायुज्यं एष्ये।'८४। एवं स्तुवन्ती स+अञ्जन+अश्रु+लीढ+स्तन+स्वर्ण+घटा हठात् स्वां धवेन समं उद्धर्तु+कामा अपि सा जवेन आगत्य हरिं ननाम।८५। देवः आयान्तीं प्रणतां तां 'त्वं सौभाग्यवती भव' इति आह। पुनः 'अष्ट+पुत्रा' इति च भगवान् प्रीतः आह।८६।

'हे भगवंता, तू साधूंचा आणि धर्माचा त्राता आहेस. तूच ब्रह्मा-विष्णू-शिव या तीन रूपांनी विश्वाच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचा कर्ता आहेस, कारण तूच सर्वांचा ईश्वर आहेस. तुझी बिरुदावली त्रैलोक्यांत पसरलेली आहे. तूच श्रीहरी आणि तूच दयासागर दाता आहेस. तुझ्या कृपालेशाने किती तरी स्त्रियांना पती आणि पुत्र यांचे सुख लाभलेले आहे. आज मीसुद्धां पती आणि पुत्र यांचे सुखाने हर्ष पावून पूर्णकाम झाले आहे; आणि तुझी कीर्ती घेऊन स्वर्गाला जाते आहे!८४. 'देवा रे, तुझ्या प्रभावाने मेलेलाही (माझा पती) जिवंत झाला, रोग्याला आरोग्य मिळाले, आर्ताला सुख मिळाले, दरिद्री धनवान झाला आणि अज्ञानीही ज्ञानवान् झाला. आज मी पतीसह मी तुझे सायुज्य प्राप्त करीत आहे!८५. अशी उपरोधात्मक स्तुती करीत, काजळाने काळवंडलेल्या अश्रूंनी आपले सोन्याच्या घटासारखे स्तन भिजवीत, आपल्या व पतीच्या उद्धाराच्या तीव्र इच्छेने, वेगाने श्रीगुरूंसमोर येऊन तिने त्यांना नमस्कार केला. आपल्या समोर येऊन नमस्कार करणाऱ्या त्या सतीला पाहून श्रीगुरुदेव 'तूं सौभाग्यवती हो', असे म्हणाले; तसेच पुन्हा प्रेमाने 'अष्टपुत्रा हो' असेही म्हणाले.८६.

**तच्छ्रुत्वा चकिता लोकाः शशंसुः सर्वमादितः । प्रभुः प्राह न मे वाक्यं मोघं शवमिहानय ।।८७।।**
**अत्रान्तरे द्विजा एत्य रौद्र्यानर्चुर्गुरुं तदा । आनीतं शवमुद्वीक्ष्य सुधादृष्ट्या स्वसंनिधौ ।।८८।।**
**स्थापयित्वा स तं रौद्र-मन्त्रिताद्भिस्तनुं समाम् । स्नापयामास सोऽकस्मात् सुप्तोत्थितवदुत्थितः ।।८९।।**
**तदा हर्षाश्रुपूर्णाक्षी लज्जितं विस्मितं पतिम् । प्रेम्णा शशंस तत्सर्वमूचतुः प्राञ्जली उभौ ।।९०।।**

तत् श्रुत्वा चकिताः लोकाः सर्वं आदितः शशंसुः। प्रभुः प्राह, 'मे वाक्यं मोघं न। शवं इह आनय।'८७। अत्र+अंतरे द्विजा एत्य गुरुं रौद्र्यान् अर्चुः। तदा आनीतं शवं सुधा+दृष्ट्या उद्वीक्ष्य तं स्व+संनिधौ।८८। स्थापयित्वा, सः समां तनुं रौद्र+मंत्रित+अद्भिः स्नापयामास। सः अकस्मात् सुप्त+इत्थित इव उत्थितः।८९। तदा लज्जितं विस्मितं पतिं हर्ष+अश्रु+पूर्ण+अक्षी तत् सर्वं प्रेम्णा शशंस। उभौ प्राञ्जलिः ऊचतुः।९०।

ते ऐकून विस्मित झालेल्या लोकांनी श्रीगुरूंना पहिल्यापासून सर्व हकीकत सांगितली. प्रभू म्हणाले, 'माझे वचन कधीच निष्फल होत नाही. ते प्रेत इथे घेऊन या.'८७. इतक्यात ब्राह्मणांनी येऊन श्रीगुरूंची रुद्रमंत्रांनी पूजा केली. तोपर्यंत लोकांनी आणलेल्या प्रेतावरून आपली अमृतदृष्टी फिरवून ते शव आपल्याजवळ ठेवायला लावले,८८. आणि त्याला रौद्रमंत्रांनी अभिमंत्रित केलेल्या जलाने स्नान करविले. त्या वेळी तो सतीचा मृत पती झोपेतून उठावा तसा अकस्मात् उठून बसला.८९. तेव्हां सर्व लोकांना लाजणाऱ्या आणि विस्मित झालेल्या आपल्या पतीला त्या सतीने आनंदाश्रूंनी पाणावलेल्या डोळ्यांनी सर्व कांही सांगितले. त्या वेळी त्या दोघांनीही हात जोडून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली.९०.

**आवां स्वो दुर्धियौ पापौ भवत्स्मृतिपरायुखौ । तथापि त्वं दयासिन्धो सच्चिदानन्द हंसि नो ।।९१।।**
**जगद्गुरो विश्वमूर्ते परमात्मन्त्राहि विश्वप । विश्वसाक्षिन्विश्वसंस्थ सर्वानन्दनिधे हरे ।।९२।।**
**कर्ताऽकर्ताऽन्यथाकर्ता त्वमेवासि पुमर्थदः । आवाभ्यामपराद्धं तत् क्षामये त्वाद्य कात्स्न्र्यतः ।।९३।।**
**एवं तौ बहुशो नत्वा प्रणतीश्चक्रतुर्मुदा । तच्चित्रं प्रेक्ष्य लोकोऽपि तुष्टाव परमेश्वरम् ।।९४।।**

'आवां दुर्धियौ, पापौ, भवत्+स्मृति+पराङ्मुखौ स्वः। तथापि (हे) दया+सिन्धो (हे) सच्चिदानंद, त्वं नो हंसि।'।९१। '(हे) जगद्+गुरो, विश्व+मूर्ते, परमात्मन्, विश्व+प, विश्व+साक्षिन्, विश्व+संस्थ, सर्व+आनन्द+निधे, हरे, त्राहि।९२। त्वं एव कर्ता, अकर्ता, अन्यथा+कर्ता, पुं+अर्थदः असि। आवाभ्यां अपराद्धं तत् अद्य त्वां कात्स्न्र्येन क्षामये।'९३। एवं तौ बहुशः मुदा नत्वा प्रणतीः चक्रतुः। तत् चित्रं प्रेक्ष्य लोकः अपि परमेश्वरं तुष्टाव।९४।

'आम्ही पापी आणि दुष्ट बुद्धीचे असून तुझ्या स्मरणालाही विमुख आहो. तरी हे दयासागरा, सच्चिदानंदा, तू आमचा घात न करता रक्षणच करतोस.'९१. 'अहो जगद्गुरो, विश्व हेच ज्यांचे मूर्त स्वरूप आहे अशा परमात्मा, जगाचे पोषण करणाऱ्या, जगत्साक्षी, जगच्या अधिष्ठाना, सर्व आनंदाच्या निधाना, हरे, आमचे रक्षण कर.९२. तूच कर्ता, अकर्ता, अन्यथाकर्ता तसेच सर्व पुरुषार्थांचा दाता आहेस. आमचे उभयतांच्या सर्वही अपराधांची आज क्षमा मागते.' (एकवचनी क्रियापदाच्या योजनेवरून ही क्षमायाचना ती सती करते आहे असे समजावे.)९३. अशा तऱ्हेने त्या दंपतीने श्रीगुरूंना आनंदभराने वारंवार वाकून अनेक वेळा नमस्कार केला. हा चमत्कार पाहून तिथे जमलेल्या लोकांनीही श्रीगुरुदेवांची स्तुती केली.९४.

**तत्रैको धूर्त आहेशं केऽस्ति ब्रह्मलिपिर्न वा । नाल्पो मृत्युर्महानेष सास्ति चेज्जीवितः कुतः ।।९५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धात्रात्र लिखितं त्रिंशदायुरेष्यभवे शतम् । याच्ञयैष्यं शतं त्वत्र गृहीत्वा व्यस्तमाचरम् ।।९६।।**
**तच्छ्रुत्वा मिलिता लोका उच्चैश्चक्रुर्जयध्वनिम् । स्ववासिश्रोत्रविवर-विश्रान्तिमघमर्षणम् ।।९७।।**
**दम्पती प्राह भगवानायुष्मन्तौ निरामयौ । सुपुत्रधनकीर्त्याढ्यौ लोकवन्द्यौ भविष्यतः ।।९८।।**

तत्र एको धूर्तः ईशं आह। के ब्रह्म+लिपिः अस्ति वा न? एष मृत्युः अल्पः न, महान (अस्ति)। (लिपिः) अस्ति चेत् सः कुतः जीवितः?९५। श्रीगुरुः उवाच । अत्र धात्रा त्रिंशत् आयुः लिखितम्। एष्य+भवे शतम्। अत्र तु याच्ञया एष्यं शतं गृहीत्वा व्यस्तं आचरम्।९६। तत् श्रुत्वा मिलिता लोकाः उच्चैः स्वः+वासि+श्रोत्र+विवर+विश्रान्तिं अघमर्षणं जय+ध्वनिं चक्रुः।९७। भगवान दम्पती प्राह, 'आयुष्मन्तौ, निरामयौ, सुपुत्र+धन+कीर्ति+आढ्यौ लोक+वन्द्यौ भविष्यतः।'९८।

तिथे एक धूर्त (चिकित्सक, बुद्धिवादी) होता. तो श्रीगुरूंना म्हणाला, 'कपाळावर ब्रह्मदेवाचा लेख असतो की नाही? हा कांही टाळता येण्यासारखा अल्प मृत्यू नव्हता. दीर्घकाळ क्षयानंतर आलेला हा मृत्यू महान - काळमृत्यूच असला पाहिजे. जर ब्रह्मदेवाने हेच त्याच्या कपाळी लिहिले असेल तर कसा जिवंत झाला?'९५. श्रीगुरूंच्या अघटितघटनापटुत्वाची एवढी प्रत्यक्ष प्रचीती आलेली असूनही श्रद्धेच्या अभावी त्याने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर श्रीगुरू त्याच्याच भाषेत देत आहेत. ते म्हणाले, 'खरे आहे, ब्रह्मदेवाने या जन्मात याला तीस वर्षेच आयुष्य लिहिलेले आहे. पण पुढच्या जन्मात शंभर वर्षे आयुष्य लिहिलेले आहे. ते मागून घेऊन आम्ही या जन्मात शंभर व पुढच्या जन्मात तीस अशी अदलाबदल केली आहे.'९६. ते ऐकून तिथे जमलेल्या लोकांनी जो पापनाशक जयजयकार केला तो स्वर्गांतील देवांच्या कर्णरंध्रांत जाऊनच विसावला.९७. श्रीगुरू भगवान त्या दंपतीला म्हणाले, 'तुम्ही दीर्घायुषी, आरोग्यसंपन्न, पुत्रवान, धनसंपन्न, कीर्तिमान होऊन लोकांत पूज्यता पावाल.'९८.

**श्रुत्वा गुरोर्गां प्रमुदान्वितावुभौ स्नात्वा गुरोश्चक्रतुरर्चनं तदा ।**
**अस्तं गतोऽर्कोऽप्यज आह्निकीं क्रियां कृत्वा मठं सर्वजनैः सहाययौ ।।९९।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे मृतसंजीवनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

**आदितः षोडशोऽध्यायः ।।१६।। ।। श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ।। ।। श्रीगुरुदेव दत्त ।।**

गुरोः गां श्रुत्वा तौ उभौ प्रमुदितान् स्नात्वा गुरोः अर्चनं चक्रतुः। तदा अर्कः अपि अस्तं गतः। अजः आह्निकीं क्रियां कृत्वा सर्वजनैः सह मठं आययौ।९९।

हे श्रीगुरूंचे आशीर्वचन हे ऐकून त्या दंपतीला अत्यंत हर्ष झाला. त्यांनी स्नान करून श्रीगुरूंचे पूजन केले. एवढ्यांत सूर्यही अस्तमानाला गेला. श्रीगुरूंनीही सायंकाळचे आह्निक केले आणि सर्व लोकांसह मठांत परतले.९९.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला तिसरा आणि प्रथमपासून सोळावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। सप्तदशोऽध्यायः ।।

### ।। सिद्ध उवाच ।।

**अन्येद्युराह साध्वीशं पूर्वेद्युः कश्चनैत्य सन् । तत्त्वज्ञानेन माश्वास्य भस्माक्षान्चतुरो ददौ ।।१।।**
**प्राह दृष्ट्वा गुरूं तीर्थैः पतिं प्रोक्ष्यानुयाहि तम् । इत्युक्त्वागात्स कस्तीर्थ-रुद्राक्षमहिमा कियान् ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**रूपान्तरेण ते भावो मयैवाङ्ग परीक्षितः । धन्यासि सुभगे साध्वि तीर्थाक्षमहिमा त्वियान् ।।३।।**

सिद्ध उवाच। अन्येद्युः साध्वी ईशं आह। पूर्वेद्युः कश्चन सन् एत्य मां तत्त्वज्ञानेन आश्वास्य भस्म (एवं) चतुरः अक्षान् ददौ।१। (सः) प्राह, गुरुं दृष्ट्वा पतिं तीर्थैः प्रोक्ष्य तं अनुयाहि। इति उक्त्वा अगात्। सः कः? तीर्थ-रुद्राक्ष+महिमा कियान्?२। श्रीगुरुः उवाच। (हे) अङ्ग, मया एव रूपान्तरेण ते भावः परीक्षितः। (हे)साध्वि, सुभगे, धन्या असि! तीर्थ+अक्ष+महिमा तु इयान्।३।

श्रीगणेशाय नमः। *रुद्राक्षाचे आणि भस्माचे माहात्म्य सतरावीं सतीप्रती। मंत्रोपदेशाचा न अधिकार स्त्रियांना म्हणुनी सोमवारव्रत उपदेशिती।।* सिद्ध पुढे नामधारकाला सांगतात. दुसऱ्या दिवशी त्या साध्वीने श्रीगुरूंना विचारले, 'काल कुणी एक साधूंनी येऊन माझे तत्त्वज्ञानाच्या उपदेशाने सांत्वन केले आणि मला भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन (१) सांगितले की, 'श्रीगुरूंचे दर्शन घेऊन त्यांचे पादतीर्थ पतीच्या शवावर शिंपून मग तू सहगमन कर.' ते साधू कोण होते? आणि त्या रुद्राक्षांचा तसेच तीर्थाचा काय महिमा आहे?२. श्रीगुरू म्हणाले, 'हे बाळे, मीच दुसऱ्या रूपाने तुझ्या भक्तीची परीक्षा पाहिली. हे भाग्यवती साध्वी, तू खरेच धन्य आहेस! रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा असा आहे.'३.

**तन्माहात्म्यं कोऽत्र वक्ति भूषेशस्यामृतत्वदा । नृणामेकादिवक्त्राक्षा गङ्गास्नानादिपुण्यदाः ॥४॥**
**वराः स्युर्धातुरत्नाढ्याः शिव एव सहस्रधृक् । नाक्षैर्विना पुण्यलब्धिः पापनाशोऽक्षधारणात् ॥५॥**
**ईशनामाक्षभस्माढ्यो दुर्धरो मरुतामपि । जपेऽक्षाः प्राज्यफलदा ना भस्माक्षैर्विना पशुः ॥६॥**
**दन्ताभ्राब्ध्यर्कनृपभू-क्ष्मार्काष्टाशोन्मिताक्षतः । कण्ठकश्रुतिदोश्चूडा-दृक्करोरांसि भूषयेत् ॥७॥**

तन्+माहात्म्यं अत्र कः वक्ति ? ईशस्य अमृतत्वदा भूषा। नृणां एकादि+वक्त्र+अक्षाः गङ्गा+स्नान+आदि पुण्यदाः।४। धातु+रत्न+आढ्याः वराः स्युः। सहस्रधृक् शिव एव। अक्षैः विना पुण्य+लब्धिः न। अक्ष+धारणात् पापनाशः।५। ईश+नाम+अक्ष+भस्म+आढ्यः मरुतां अपि दुर्धरः। जपे अक्षाः प्राज्य+फलदाः। भस्म+अक्षैः विना ना पशुः।६। दन्त+अभ्र+अब्धि+अर्क+नृप+भू+क्ष्मा+अर्क+अष्टाशोन्मित अक्षतः कण्ठ+क+श्रुति+दोः+चूडा+दृक्+कर+ऊर+अंसि भूषयेत्।७।

भगवान शंकरही ज्या रुद्राक्षांना भूषण म्हणून धारण करतात अशा मोक्षप्रद रुद्राक्षांचे माहात्म्य कोणाला बरे सांगता येईल? एकमुखी, पंचमुखी, एकादशमुखी, चतुर्दशमुखी इत्यादि प्रकारचे रुद्राक्ष गंगास्नानादिकांचे पुण्य देतात.४. सुवर्णादि धातूंनी किंवा रत्नांनी मढविलेले रुद्राक्ष उत्तम होत! एक हजार रुद्राक्ष धारण करणारा पुरुष शिवसदृश होतो. रुद्राक्ष धारण न करता कुठलेही पुण्य घडत नाही. केवळ रुद्राक्ष घातल्याने पापांचा क्षय होतो.५. मुखांत शिवनाम, शरीरावर रुद्राक्ष आणि अगावर भस्म धारण करणारा देवांनासुद्धा अजेय आहे. रुद्राक्षाच्या माळेने जप केल्यास अनंत फळ मिळते. भस्म आणि अक्ष रहित पुरुषही पशूसमानच होय.६. ३२ (*दंत*) रुद्राक्ष गळ्यांत, २४ (*अभ्राब्धि*) मस्तकावर, १२ (*अर्क*) कानांवर, १६ (*नृप*) बाहूंवर, १ (*भू*) शेंडीला, १ (*क्ष्मा*) डोळ्यांच्या मधे - भ्रूमध्यावर डोक्यावरून दोऱ्याने बांधून सोडलेला, १२ (*अर्क*) हातांवर आणि एकशे आठ रुद्राक्षांची माळ छातीवर याप्रमाणे धारण करावेत.७.

**काश्मीरे भद्रसेनस्य सुतस्तन्मन्त्रिणोऽप्युभौ । भूषां मत्वाश्मवत्स्वक्षान् बाल्येऽपि दधतुर्मुदा ।।८।।**
**शाक्त्यो राजाग्रहात्प्राह तद्धेतुं शृणु भूपते । नन्दिग्रामे पुरा तन्वी वारमुख्येन्दुभा सती ।।९।।**
**गजाश्वधनदाराढ्या धर्मज्ञा दानतत्परा । तन्नाट्यमण्डपे त्वेतौ साक्षौ मर्कटकुक्कुटौ ।।१०।।**
**शिवोऽस्या वैश्यरूपेण पातिव्रत्यं परीक्षितुम् । धृत्वाप कङ्कणं लिङ्गं भास्वद्वेश्याऽब्रवीत्सखीम् ।।११।।**

काश्मीरे भद्रसेनस्य सुतः, तत्+मंत्रिणः अपि, उभौ भूषां अश्मवत् मत्वा बाल्ये अपि सु+अक्षान् मुदा दधतुः।८। शाक्त्यः राज+आग्रहात् तत् हेतुं प्राह। (हे) भूपते, पुरा नन्दिग्रामे इन्दु+भा सती वारमुख्या (अभूत्)।९। (सा) गज+अश्व+धन+दारा+आढ्या धर्मज्ञा, दानतत्परा। तत् नाट्य+मंडपे तु एतौ स+अक्षौ मर्कट+कुक्कुटौ।१०। शिवः अस्य पातिव्रत्यं परीक्षितुं वैश्यरूपेण कङ्कणं (च) भास्वत् लिङ्गं धृत्वा आप। वेश्या सखीं अब्रवीत्।११।

रुद्राक्षमाहात्म्याची कथा सांगत आहेत. काश्मीरचा राजा भद्रसेन याचा मुलगा तसेच त्याच्या मंत्र्याचाही मुलगा ह्या दोघांनाही लहानपणापासून अलंकारांची नावड होती. ते त्यांना दगडासारखे वाटायचे. मात्र चांगले चांगले रुद्राक्ष मिळवून ते मोठ्या आवडीने धारण करीत.८. भद्रसेन राजाकडे एकदा पराशर ऋषी आले. राजाने वारंवार आग्रह केल्याने त्यांनी त्याला त्या बालकांच्या ह्या जगावेगळ्या वर्तनाचे कारण सांगितले. ते म्हणाले, 'पूर्वी नन्दिग्राम नावाच्या गावी एक सद्वर्तनी वेश्या राहत होती.९. ती हत्ती, घोडे, पैसा दास, दासी इत्यादींनी संपन्न असून धर्म जाणणारी, त्याप्रमाणे वागणारी आणि दानतत्पर होती. तिच्या रंगमहालांत तिने पाळलेले हे दोघे माकड आणि कोंबडा रुद्राक्षांनी सजविलेले होते.१०. ती वेश्या असूनही स्वतःला पतिव्रता मानत असे; आणि पातिव्रत्यधर्माचे पालन करीत असे. एकदा तिच्या पातिव्रत्याची परीक्षा पाहण्यासाठी भगवान शंकर एका व्यापाऱ्याचे रूप घेऊन हातांत कङ्कण आणि तेजस्वी शिवलिंग धारण करून तिथे आले. त्यांना घरापुढून जाताना पाहून वेश्या आपल्या सखीला म्हणाली.११.

**परिपृच्छैनमर्घाच्चेद् रत्या वा दास्यति त्र्यहम् । साध्वीत्वेन वधूर्भूत्वा रमयाम्यस्मि पद्मिनी ।।१२।।**
**श्रुत्वोचे स तथा पृष्टं स्वैरिण्यां सत्यता कुतः । युष्माकं कुलधर्मस्तु व्यभिचारो हि केवलम् ।।१३।।**

**।। वेश्योवाच ।।**

**न स्वैरिणीयं साध्व्येव लिङ्गं तत्र प्रमा खलु । अहं त्र्यहं सतीत्वेन भजे त्वां सर्वभावतः ।।१४।।**

**।। वैश्य उवाच ।।**

**गृहाणेदं पुष्पवन्तौ साक्षिणावत्र मेऽसुवत् । स्ववाक्यं दृढभक्त्यैव विचारय पुनः पुनः ।।१५।।**

'एनं परिपृच्छ अर्घात् रत्या वा (इदं लिङ्गं) दास्यति चेत् अहं त्रि+अहं तस्य साध्वीत्वेन वधूः भूत्वा रमयामि। पद्मिनी अस्मि।'१२। तथा पृष्टं श्रुत्वा सः ऊचे, 'स्वैरिण्यां सत्यता कुतः? युष्माकं कुलधर्मः तु केवलं व्यभिचारः।'।१३। वेश्या उवाच। 'इयं न स्वैरिणी, साध्वी एव। तत्र लिङ्गं प्रमा खलु। अहं त्रि+अहं त्वां सर्वभावतः सतीत्वेन भजे।'१४। वैश्य उवाच, 'इदं मे असुवत् गृहाण। अत्र पुष्पवन्तौ साक्षिणः। स्ववाक्यं दृढ+भक्त्या एव पुनः पुनः विचारय।'१५।

'या व्यापाऱ्याला विचारा की त्याचे ते शिवलिंग तो विकत किंवा संभोगाच्या मोबदल्यांत देईल कां? तसे असेल तर मी तीन दिवस त्याची पत्नी होईन आणि पातिव्रत्याने त्याला सुखवीन. मी पद्मिनी आहे.' (*पद्मिनी* म्हणजे कामशास्त्रानुसार उत्तम स्त्री.)१२.

त्या व्यापाऱ्याला तसे विचारले असता तो म्हणाला, 'तुम्हा स्वैराचारी वेश्यांचे बोलणे कसे खरे मानायचे? व्यभिचार हाच तर तुमचा कुळाचार आहे.'१३. ती वेश्या म्हणाली की, 'मी स्वैरिणी नसून खरोखर साध्वीच आहे. या लिंगाची भाक घेऊन सांगते की मी तीन दिवसपर्यंत तुमची एकनिष्ठ पत्नी म्हणून राहीन.'१४. तो वैश्य म्हणाला, 'ठीक आहे तर! हे माझे प्राणप्रिय लिंग सूर्य आणि चंद्रांना साक्षी ठेवून घे. आपल्या वचनावर दृढ भक्तीने वारंवार विचार कर!'१५.

**इत्युक्त्वा तत्करे बध्वा कङ्कणं लिङ्गमर्पयत् । साध्वीत्वेनापि सा भेजे लिङ्गं संस्थाप्य मण्डपे ।।१६।।**
**सलिङ्गो मण्डपो दग्धोऽग्निनाकस्माद्रतिक्षणे । सकीशकुक्कुटो वैश्यो जुहावाग्नौ तनुं तदा ।।१७।।**
**वेश्याऽपि भर्तृनाशार्ता कुलाचारविरुद्धताम् । मा भजेति निषिद्धाऽपि स्वैः सिद्धानुगमेऽभवत् ।।१८।।**
**दत्वा दानानि नत्वार्कं ध्यात्वेशं वह्निमाविशत् । प्रादुर्भूतस्तदा त्र्यक्षः पञ्चास्यः प्राह पङ्क्तिदोः ।।१९।।**
**मायामुद्भाव्य ते सर्वं मयेशेन परीक्षितम् । वारमुख्यापि साध्वी त्वं प्रीतोऽस्मि वरयेप्सितम् ।।२०।।**

इति उक्त्वा तत्+करे कङ्कणं बध्वा लिङ्गं अर्पयत्। सा अपि लिङ्गं मण्डपे संस्थाप्य (तं) साध्वीत्वेन भेजे।१६। रतिक्षणे अकस्मात् स+कीश+कुक्कुटः सलिङ्गः मंडपः अग्निना दग्धः। तदा वैश्यः अग्नौ तनुं जुहौ।१७। वेश्या अपि भर्तृ+नाश+आर्ता, स्वैः 'कुलाचार+विरुद्धतां मा भज' इति निषिद्धा अपि अनुगमे सिद्धा अभवत्।१८। दानानि दत्वा, अर्कं नत्वा, ईशं ध्यात्वा (सा) वह्निं आविशत्। तदा त्रि+अक्षः पञ्च+आस्यः पङ्क्ति+दोः प्रादुर्भूतः प्राह।१९। मया ईशेन मायां उद्भाव्य ते सर्वं परीक्षितम्। वारमुख्या अपि त्वं साध्वी। प्रीतः अस्मि। ईप्सितं वरय।२०।

असे बोलून त्याने तिच्या हातांत कङ्कण बांधून ते लिंग तिला दिले. तिनेसुद्धा ते लिंग मंडपांत ठेवले आणि त्याच्या बरोबर पत्नीधर्माने अंतर्गृहात गेली.१६. संभोगाच्या वेळी अचानक त्या मंडपाला आग लागली आणि तिथे ठेवलेले ते लिंग आणि ते माकड आणि कोंबडाही जळून भस्म झाले. ते पाहून त्या वैश्यानेही त्या अग्नीत आपले शरीर अर्पण केले.१७. पतीच्या मृत्यूने तळमळणारी ती वेश्याही पतीबरोबर सहगमन करण्यास निघाली. तिच्या स्वकीयांनी तिला खूप समजावले की 'आपल्या कुलधर्माच्या विरुद्ध असलेले कर्म तू करू नकोस.' पण तिने कुणाचेही ऐकले नाही.१८. यथाविधी दाने आणि वाणे देऊन, सूर्यनारायणाला नमस्कार करून भगवान शंकरांचे ध्यान करीत तिने अग्नीत प्रवेश केला. त्या वेळी तीन नेत्र, पाच मुखे आणि दहा भुजा असलेले भगवान शिव तेथे प्रकटले आणि म्हणाले.१९. 'मीच मायेने हे सर्व दाखवून तुझे धर्म, धैर्य आदींची परीक्षा पाहिली. तू वेश्या असलीस तरी खरोखर साध्वीच आहेस. मी प्रसन्न झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे.'२०.

**जैह्व्यौपस्थ्यं सुखं क्वापि न काङ्क्षे मे स्वकैः समम् । सायुज्यं तेऽर्पयेत्यूचे सा शिवोऽपि तथाऽकरोत ।।२१।।**
**तौ कीशकुक्कुटावेतौ पूर्वसंस्कारकारणात् । एतौ स्तोऽक्षप्रियौ शैवौ मताश्मसमभूषणौ ।।२२।।**
**तच्छ्रुत्वा भावि मे सूनोर्मुने शंसेति पृच्छते । राज्ञे तस्य मृतिर्नूनं सप्ताहादिति सोऽब्रवीत् ।।२३।।**
**मुहू राज्ञातिखिन्नेन प्रणतेनार्थितोऽब्रवीत् । पराशरऋषिर्मा भी राजन् रुद्रोऽस्ति तारकः ।।२४।।**
**स्रष्टा सृष्टौ जगद्वृद्ध्यै धर्माधर्मौ तयोः पती । इन्द्रान्तकौ तौ स्वरधो-नेतारौ धन्यपापिनाम् ।।२५।।**

'जैह्व्य+औपस्थ्यं सुखं क्व अपि न कांक्षे। मे स्वकैः समं ते सायुज्यं अर्पय,' इति सा ऊचे। शिवः अपि तथा अकरोत्।२१। एतौ तौ कीश+कुक्कुटौ पूर्व+संस्कार+कारणात् अक्षप्रियौ मत+अश्म+सम+भूषणौ शैवौ स्तः।२२। तत् श्रुत्वा, (हे) मुने, मे सूनोः भावि शंस इति पृच्छते राज्ञे, तस्य नूनं सप्ताहात् मृतिः इति सः अब्रवीत्।२३। मुहु अति+खिन्नेन प्रणतेन राज्ञा अर्थितः पराशरऋषिः अब्रवीत्। '(हे) राजन्, मा भीः। रुद्रः तारकः अस्ति।२४। स्रष्टा जगद्+वृद्ध्यै धर्म+अधर्मौ सृष्टौ। तयोः पती इन्द्र+अन्तकौ। तौ धन्य+पापिनां स्वः+अधो+नेतारौ।२५।

'जीभ आणि लिंग इत्यादींपासून होणाऱ्या ऐंद्रिय सुखाची, मग ते ऐहिक असो की पारलौकिक, मला मुळीच इच्छा नाही. मला माझ्या स्वकीयांसह आपले सायुज्य द्या,' असे ती वेश्या म्हणाली. भगवान शंकरांनी त्याचप्रमाणे तिला सपरिवार सायुज्य मुक्ती दिली.२१. हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा दोघे, तेच मंडपांत जळून गेलेले मर्कट आणि कुक्कुट आहेत. पूर्वजन्मीच्या संस्कारामुळे हे रुद्राक्षांची आवड असलेले आणि रत्नालंकारांना पाषाणासारखे तुच्छ मानणारे शिवभक्त झाले आहेत.'२२. ते आपल्या मुलाचे पूर्ववृत्त ऐकून राजाने विचारले की, 'ऋषिमहाराज, माझ्या मुलाचे भविष्य सांगा.' तेव्हां पराशर मुनींनी उत्तर दिले की, 'तुझ्या मुलाचा अवघ्या सात दिवसांनी मृत्यू होईल.'२३. ते ऐकून अत्यंत दुःखी झालेल्या राजाने वारंवार नमस्कार करून ह्या आपल्या मुलाच्या प्राणांसाठी प्रार्थना केली. त्यावर पराशर ऋषींनी त्याला धीर देत सांगितले, 'राजा! भिऊ नकोस. रुद्राध्याय तारक आहे.'२४. ब्रह्मदेवाने जगताच्या विस्तारासाठी धर्म आणि अधर्म निर्माण केले. धर्माचा पती इंद्र आणि अधर्माचा पती यम, हे दोघे अनुक्रमे पुण्यवान् आणि पापी लोकांना स्वर्गाला आणि नरकाला घेऊन जातात.२५.

**यमसारथयः काम-मुखा नानाघहेतवः । तत्सारथ्याद्यमो लोकान् पापान्क्षिपति दुर्गतौ ।।२६।।**
**बुद्धीन्द्रियमनःसंस्था अमी कामादयोऽबलाः । भीरून्निघ्नन्ति यमित-गोहृद्धीनामगोचराः ।।२७।।**
**वेदान्स्रष्टाऽसृजत्तत्र दक्षास्योत्थयजुःश्रुतेः । महारुद्रोऽघहृल्लब्धो मुनिभिः प्रसृतस्ततः ।।२८।।**

काममुखा यमसारथयः नाना+अघ+हेतवः। तत्+सारथ्यात् यमः पापान् लोकान् दुर्गतौ क्षिपति।२६। बुद्धि+इंद्रिय+मनः+संस्था अमी कामादयः अबलाः भीरून् निघ्नन्ति। यमित+गो+हृत्+धीनां अगोचराः।२७। स्रष्टा वेदान् असृजत्। तत्र दक्ष+आस्य+उत्थ+यजुः+श्रुतेः मुनिभिः अघहृत् महारुद्रः लब्धः। ततः प्रसृतः।२८।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ हे यमाचे सहायक आहेत. हेच नानाविध पापांचे मूळ आहेत. त्यांच्या साह्याने यम पापी लोकांना नरकात टाकतो. 'माणसाला पापाला प्रवृत्त करणारे कोण आहेत?' या अर्जुनाच्या प्रश्नाला 'रजोगुणापासून उद्भवणारे हे महापापी आणि खादाड काम आणि क्रोधच वैरी आहेत.' असे भगवंतांनी उत्तर दिले आहे (*काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।* भ.गीता ३:३७).२६. हे कामादि यमाचे सेवक बुद्धी, इंद्रिये आणि मन यांच्या आश्रयाने राहतात (*इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।* भ.गीता ३:४०). तसे ते निर्बळच आहेत; पण भित्र्या लोकांचा घात करतात. मात्र इंद्रिये, मन आणि बुद्धी यांच्यावर नियंत्रण ठेवणाऱ्यांच्या ते वाऱ्यालाही उभे राहत नाहीत. कठोपनिषदांत (१:३:१०-११) सांगितल्याप्रमाणे इंद्रियांपेक्षा विषय श्रेष्ठ आहेत. विषयांहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहेत. आत्मा सर्वांहून वर असल्याने इंद्रियादींचे नियमन करणाऱ्या आत्मसाधकांना कामादींचे दर्शनही होत नाही हे उघडच आहे.२७. श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितल्याप्रमाणे (६:१८) ईश्वराने वेद निर्माण केले. ब्रह्मदेवाच्या उजव्या मुखापासून यजुर्वेदाची उत्पत्ती झाली. त्याच्यातून ऋषीमुनींना पापनाशक अशा महान् रुद्राध्यायाची प्राप्ती झाली. ती त्यांनी शिष्य-प्रशिष्यपरंपरेने प्रसृत केली.२८.

**विप्रा यत्र पठन्त्येतं कामाद्याः सकला न तम् । देशं शेकुरपि द्रष्टुं याम्यं शून्यमभूत्पुरम् ।।२९।।**
**यमः शशंस तद्धात्रे स्वपन्तिष्ठन्व्रजन्कुधीः । मत्तोऽभक्तिर्जपति चेत्स पापी शाधि तं भृशम् ।।३०।।**
**तद्भिन्नान्जापकान् रुग्णान्मा प्रेक्ष मृतिगानपि । श्रीविदारोग्यादिभाजस्त इत्याह यमं विधिः ।।३१।।**
**तस्मान्मृत्युञ्जयस्त्राता मा भीः सद्ब्रह्मतः शिवे । अतिरुद्राभिषेकात्स भवेद्भूपायुतायुरित् ।।३२।।**

यत्र विप्रा एतं पठन्ति तं देशं कामाद्याः सकलाः द्रष्टुं अपि न शेकुः। याम्यं पुरं शून्यं अभूत्।२९। यमः तत् धात्रे शशंस। (स आह) 'स्वपन् तिष्ठन्, व्रजन्, कुधीः मत्तः अभक्तिः जपति चेत् सः पापी। तं भृशं शाधि।'३०। तद्+भिन्नान् जापकान् रुग्णान्, मृतिगान् अपि मा प्रेक्ष। ते श्री+वित्+आरोग्य+आदि+भाजः, इति विधिः यमं आह।३१। तस्मात् मृत्युञ्जयः त्राता, मा भीः। (हे)भूप, सद्+ब्रह्मतः शिवे अतिरुद्राभिषेकात् सः अयुत+आयुः भवेत्।३२।

जिथे ब्राह्मण या रुद्राध्यायाचे पठण करीत त्या देशाकडे कामादि सर्व पाहूही शकले नाहीत. अर्थात् यमपुरीतील सर्व नरक ओस पडले.२९. यमाने ही गोष्ट ब्रह्मदेवांना सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'जे कुणी ह्या रुद्राध्यायचा पाठ झोपून, उभ्याने, चालत, लोभाविष्ट बुद्धीने किंवा माझ्या भक्तीविना करतील ते पापी आहेत. त्यांना तू कठोर शासन कर.'३०.

'वर सांगितलेले सोडून इतर जे जापक असतील, ते जरी आजारी, अगदी मरायला टेकलेले असले तरी त्यांच्याकडे पाहूसुद्धा नकोस. त्यांना संपत्ती, विद्या, आरोग्य इत्यादींची प्राप्ती होईल.' याप्रमाणे ब्रह्मदेवांनी यमाला आज्ञा केली.३१. पराशर ऋषी सांगत आहेत, अशा रीतीने मृत्यूला जिंकणारा रुद्र तारणारा आहे, भिऊ नकोस. राजा, चांगल्या ब्राह्मणांकडून शंकराला अतिरुद्राभिषेक केल्यावर हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा ह्या दोघांचेही आयुष्य दहा हजार वर्षे होईल.३२.

**तच्छ्रुत्वा द्राक्समाहूय सद्विप्रानृष्यनुज्ञया । राजानुष्ठानमारेभे श्रद्धाभक्त्या यथाविधि ।।३३।।**
**पाशदण्डधराः प्राप्ता सप्तमेऽह्नि यमानुगाः । गूढाङ्गा मूर्छितः पुत्रस्तदा तदुपरि द्विजैः ।।३४।।**
**प्रक्षिप्तरौद्राम्बुतीर्थ-मन्त्रिताक्षतसम्भवैः । रौद्रैर्दूताः पराभूता जग्मुस्तेऽथोत्थितः सुतः ।।३५।।**
**प्रीतो राजा तदा विप्रान् भोजयित्वाभ्यतोषयत । सभां विरच्योपवेश्य स्वासने शाक्त्यमाभजत् ।।३६।।**
**रणद्वीणो हरिं गायन्तत्राप्तो नारदो नृपः । तं प्रत्युद्गम्य सम्पूज्य लोकोदन्तमपृच्छत ।।३७।।**

तत् श्रुत्वा राजा द्राक् ऋषि+अनुज्ञया विप्रान् समाहूय श्रद्धा+भक्त्या यथाविधि अनुष्ठानं आरेभे।३३। सप्तमे अह्नि पाश+दण्ड+धराः गूढ+अङ्गाः यम+अनुगाः प्राप्ता। तदा पुत्रः मूर्छितः। तत् उपरि द्विजैः।३४। प्रक्षिप्त+रौद्र+अम्बु+तीर्थ+मंत्रित+अक्षत+सम्भवैः रौद्रैः दूताः पराभूताः। ते जग्मुः। अथ सुतः उत्थितः।३५। प्रीतः राजा तदा विप्रान् भोजयित्वा अभि+अतोषयत्। सभां विरच्य शाक्त्यं स्वासने उपवेश्य आभजत्।३६। तत्र रणत्+वीणः नारदः हरिं गायन् आप्तः। नृपः तं प्रति उद्गम्य सम्पूज्य लोक+उदन्तं अपृच्छत।३७।

मुनिवरांचे बोलणे ऐकून राजाने त्यांच्याच अनुज्ञेने लगेच ब्राह्मणांना पाचारण केले. आणि श्रद्धेने व भक्तीपूर्वक यथाशास्त्र अतिरुद्राच्या अनुष्ठानाला प्रारंभ केला.३३. सातव्या दिवशी पाश आणि दंड धारण केलेले यमदूत अदृश्यतया आले. तेव्हां राजपुत्र मूर्छित झाला. त्याच्यावर ब्राह्मणांनी रुद्राभिषेकाच्या पाण्याचे तीर्थ आणि अक्षता टाकल्या. त्यांपासून उद्भवलेल्या रुद्रदूतांनी यमदूतांचा पराभव केला आणि ते यमदूत निघून गेले. मग तो राजपुत्र उठून बसला.३४-३५.

प्रमुदित राजाने विप्रांना भोजनादि देऊन दक्षिणादींनी त्यांचा सत्कार केला. मग त्याने राज्यसभा भरवून आपल्या उच्च आसनावर पराशर ऋषींना बसवून त्यांची पूजा केली.३६. इतक्यांत आपल्या वीणेचा झंकार करीत आणि हरिनामाचा गजर करीत नारद तिथे आले. राजाने सामोरे जाऊन त्यांचा सत्कार केला आणि त्यांना राजाने स्वर्गलोकाची वार्ता विचारली.३७.

**स प्राहात्र महामृत्युस् त्वत्पुत्रं हर्तुमागतः । शिवदूतैः सदूतः स पराभूतो यमं ययौ ।।३८।।**
**यमोऽपि तैः सहैत्यैशान् दूतान्प्राहेश्वराज्ञया । नियतं कर्तुमुद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः ।।३९।।**
**ऊचुस्तेऽदश्चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थो भवान्तक । स पट्टे द्वादशाब्देऽल्पं मृत्युं तीर्त्वायुतायुरित् ।।४०।।**
**भविष्यतीति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान्क्षमापयत् । दृष्टं मयेदं ते पुत्रस्त्रातः शाक्त्येन भूपते ।।४१।।**
**इत्युक्त्वा नारदोऽगात्स्वराशीर्भिरभिनन्द्य तौ । शाक्त्योऽप्यगात्स्वधामेयान्तीर्थाक्षमहिमा सति ।।४२।।**

स प्राह। 'अत्र महामृत्युः त्वत्+पुत्रं हर्तुं आगतः। शिव+दूतैः सदूतः पराभूतः सः यमं ययौ।३८। यमः अपि तैः सह एत्य ऐशान् दूतान् प्राह। 'ईश्वर+आज्ञया नियतं कर्तुं उद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः?'३९। ते ऊचुः। '(हे) अन्तक, अदः चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थः भव।' स पट्टे द्वादश+अब्दे अल्पं मृत्युं तीर्त्वा इत् अयुत+आयुः।४०। भविष्यति इति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान् क्षमापयत्। '(हे) भूपते इदं मया दृष्टम्। ते पुत्रः शाक्त्येन त्रातः।'४१। इति उक्त्वा नारदः तौ आशीभिः अभिनन्द्य स्वः अगात्। शात्त्क्यः अपि स्वधाम अगात्। (हे) सति, इयान् तीर्थ+अक्ष+महिमा।४२।

नारदमुनी म्हणाले, 'अरे राजा, आत्ता इथे महामृत्यू तुझ्या मुलाला घेऊन जायला आला होता. शिवदूतांनी त्याचा आणि त्याच्या दूतांचा पराभव केल्यावर तो यमराजाकडे गेला.३८. यमाने आपल्या दूतांचे म्हणणे ऐकले आणि तो शिवदूतांना येऊन म्हणाला, 'ईश्वराच्या आज्ञेने नेमून दिलेले कार्य मी करीत असता तुम्ही विघ्न करता हे योग्य नाही!'३९. ते शिवदूत त्याला म्हणाले, 'यमराज, ह्याची तुम्ही चित्रगुप्ताकडून खातरजमा करा ना!' तेव्हां यमधर्माने तुझ्या पुत्राचे खाते पाहिले. त्यांत असे लिहिले होते की, 'बाराव्या वर्षी अल्पमृत्यूपासून तरून तिथून पुढे तो दहा हजार वर्षे जगेल.' ते पाहून गोंधळात पडलेल्या यमाने शैवदूतांची क्षमा मागीतली. नारदमुनी पुढे म्हणाले, 'हे राजा, मी हे स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. तुझ्या मुलाला पराशरमुनींनीच जीवदान दिले आहे!'४०-४१. याप्रमाणे बोलून आणि त्या कुमारांचे आशीर्वादपूर्व अभिनंदन करून नारदमुनी स्वर्गाला गेले. पराशरही आपल्या घरी गेले. श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, हे सती, असा आहे रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा!४२.

॥ सावित्र्युवाच ॥

**यत्त्वद्दृग्गोचरा साक्षाज्जाता धन्यतमा गुरो । उपादिश मनुं मे ते पादाब्जस्मृतिहेतवे ॥४३॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**नोपदेश्यो मनुः स्त्रीणां पतिभक्तिस्तु तारका । दत्तोऽप्यनुपयुक्तः स्याद्दातुर्हानिश्च शुक्रवत् ॥४४॥**
**शृणु साध्वि पुरा देव-दैत्ययुद्धमभून्महत् । काव्यो मन्त्रजपाद्वज्रि-हतान्दैत्यानजीवयत् ॥४५॥**
**गत्वेन्द्रः शरणं शम्भुं तच्छशंस शिवेन तु । आनयित्वा कविर्लीढः सोऽपि मूत्राद्बहिर्गतः ॥४६॥**

सावित्री उवाच। '(हे) गुरो, यत् त्वत्+दृक्+गोचरा जाता धन्यतमा (अस्मि)। ते पाद+अब्ज+स्मृति+हेतवे मे मनुं उपादिश।'४३। श्रीगुरुः उवाच। 'स्त्रीणां पतिभक्तिः तु तारका, मनुः न उपदेश्यः, दत्तः अपि अनुपयुक्तः स्यात्। शुक्रवत् दातुः हानिः।'४४। '(हे) साध्वि, शृणु। पुरा महत् देव+दैत्य+युद्धं अभूत्। काव्यः मन्त्रजपात् वज्रि+हतान् दैत्यान् अजीवयत्।४५। इन्द्रः शंभुं शरणं गत्वा तत् शशंस। शिवेन तु कविः आनयित्वा लीढः। सः अपि मूत्रात् बहिः गतः।'४६।

सावित्री म्हणाली, 'गुरुमहाराज, आपल्या कृपाकटाक्षाने मी खरोखर धन्यातिधन्य झाले आहे! आपल्या पदकमलांचे स्मरण मला राहावे यासाठी आपण मला मंत्राचा उपदेश करावा.'४३. श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतिभक्ती हाच तरणोपाय आहे. स्त्रियांना मंत्र देऊ नये. दिला तरी व्यर्थच होतो. शिवाय शुक्रासारखी मंत्र देणाऱ्याचीही हानी होते.'४४. हे सती ऐक. पूर्वी देव आणि दैत्य यांचे मोठे युद्ध झाले. इंद्राच्या वज्राने दैत्यांचा संहार होत असे. पण दैत्यांचे गुरू शुक्राचार्य संजीवनी मंत्राचा जप करून त्या दैत्यांना पुनः जिवंत करीत.४५. इन्द्राने भगवान् शंकरांना शरण जाऊन हे त्यांच्या कानांवर घातले. शंकरांनी शुक्राचार्यांना आणून गिळून टाकले. पण तो कांही काळ शंकरांच्या पोटात राहून नंतर मूत्रद्वारे बाहेर पडला. पूर्वी दैत्यगुरूंचे नांव भार्गव असे होते; पण शिवाच्या शुक्राशी (वीर्याशी) संबंध आल्याने त्याचे नाव शुक्र असे पडले. स्कंद पुराणाच्या प्रभास खंडांत ही कथा आहे.४६.

**दैत्यानेत्य पुनः शुक्रस्तान्मृतानप्यजीवयत् । त्रस्तस्तदेन्द्रो धीमन्नः पाहीति प्रार्थयद्गुरुम् ।।४७।।**
**स प्राह तन्मनौ व्याजाद्भ्रंशिते वो जयो ध्रुवः । त्रिलोककण्टकोत्कर्षान् मन्त्रसारहृतिर्वरम् ।।४८।।**
**इत्युक्त्वा स कचं प्राह स्वसुतं गच्छ रे कविम् । विद्यार्थित्वेन तं तुष्ट्वा मन्त्रसारं तिरस्कुरु ।।४९।।**
**तं नत्वापि कचो गत्वा शुक्रं प्राहास्मि ते गुरो । शिष्यो मां प्रणतं शाधि पक्षित्वं मा निधा मयि ।।५०।।**
**एवमुक्तवतस्तस्य रूपसौन्दर्यमोहिता । शुक्रं प्रियात्मजोचेऽमुं शिष्यत्वेनोररीकुरु ।।५१।।**

शुक्रः पुनः दैत्यान् एत्य तान् मृतान् अपि अजीवयत्। तदा इन्द्रः त्रस्तः गुरुं धीमन् नः पाहि इति प्रार्थयत्।४७। स प्राह। 'तत्+मनौ व्याजात् भ्रंशिते (सति) वः जयः ध्रुवः। त्रिलोक+कंटक+उत्कर्षात् मंत्र+सार+हृतिः वरम्।'४८। इति उक्त्वा सः कचं प्राह। 'रे, कविं गच्छ। तं विद्यार्थित्वेन तुष्ट्वा मंत्रसारं तिरस्कुरु।'४९। तं नत्वा अपि कचः शुक्रं गत्वा प्राह। '(हे) गुरो, ते शिष्यः अस्मि। मां प्रणतं शाधि। मयि पक्षित्वं मा निधा।'५०। एवं उक्तवतः तस्य रूप+सौंदर्य+मोहिता प्रिया आत्मजा शुक्रं ऊचे। 'अमुं शिष्यत्वेन उरीकुरु।'५१।

शुक्राचार्य दैत्यांकडे परत आले आणि पुनः मृत दैत्यांना सजीव करू लागले. ह्यामुळे त्रासलेला इंद्र देवगुरू बृहस्पतींकडे गेला. आपण बुद्धिवंत आहांत, 'आमचे रक्षण करा' अशी त्याने प्रार्थना केली.४६. बृहस्पती म्हणाले, 'कांही तरी कपटाने त्या शुक्राचार्यांचा मंत्र भ्रष्ट करायला हवा. त्रैलोक्याला त्रासणाऱ्या या दैत्यांचा उत्कर्ष होण्यापेक्षा त्या मंत्राचे सारच घालवून टाकावे हे बरे!' दुर्जन वरचढ होऊ लागले तर त्यांच्या प्रतिकारासाठी कपटाचा आश्रय घेण्यांत दोष नाही, असा त्यांचा अभिप्राय.४८. असे इंद्राशी बोलून देवगुरू आपल्या पुत्राला - कचाला, म्हणाले, 'बाळा, तू शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांचे शिष्यत्व पत्कर. हर प्रकारे त्यांचे मन संतुष्टवून संधी साधून त्यांच्या मंत्राचा प्रभाव नष्ट कर.'४९. आपल्या पित्याला वंदन करून कच लगेच निघाला. शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांना नमस्कार करून म्हणाला, 'गुरुमहाराज, मी आपला शिष्य होऊं इच्छितो. नम्रपणे आपल्याला शरण आलों आहे. तरी आपण माझा अंगीकार करा. मी देवगुरूंचा पुत्र असलो तरी आपण दुजाभाव मनांत न ठेवतां माझे गुरु व्हा.'५०. कच शुक्राचार्यांशी असे बोलत असतांना, दैत्यगुरूंची एकुलती एक लाडकी कन्या देवयानी जवळच उभी होती. ती कचाच्या सुंदर रूपाने मोहित झाली आणि आपल्या पित्याला म्हणाली, 'बाबा, ह्याला शिष्य करून घ्या ना!'५१.

**तच्छ्रुत्वोशनसा सोऽपि तद्वात्सल्यादुरीकृतः । कचोऽपि सर्वभावेन शुक्रं गुरुमतोषयत् ।।५२।।**
**ज्ञात्वा तच्छाठ्यमसुराः समिदर्थं गतं वनम् । तं जघ्नुर्देवयान्याह शुक्रं नाप्तः कुतः प्रियः ।।५३।।**
**शुक्रोऽपि तं हतं ज्ञात्वा ध्यानान्मन्त्रप्रभावतः । जीवयित्वाऽऽनयद्गेहं कचं हृष्टाभवत्सुता ।।५४।।**
**मुहुर्दैत्या वने हत्वा हिंस्रेभ्यस्तत्पलं ददुः । तमदृष्ट्वैव शोचन्तीं कन्यामाश्वास्य भार्गवः ।।५५।।**
**ज्ञात्वा तं भक्षितं हिंस्रैस् तत्कुक्षेर्मन्त्रशक्तितः । कात्स्न्यान्निष्काश्य कृत्वैक्यं सजीवं पूर्ववद्व्यधात् ।।५६।।**

तत् श्रुत्वा उशनसा तत्+वात्सल्यात् सः अपि उरीकृतः। कचः अपि गुरुं शुक्रं सर्वभावेन अतोषयत्।५२। असुराः तत्+शाठ्यं ज्ञात्वा समिदर्थं वनं गतं तं जघ्नुः। देवयानी शुक्रं आह। 'प्रियः कुतः न आप्तः?'५३। शुक्रः अपि ध्यानात् तं हतं ज्ञात्वा, मंत्र+प्रभावातः जीवयित्वा कचं गेहं आनयत्। सुता हृष्टा अभवत्।५४। मुहुः दैत्याः (कचं) वने हत्वा तत्+पलं हिंस्रेभ्यः ददुः। तं अदृष्ट्वा शोचन्तीं कन्यां आश्वास्य भार्गवः।५५। तं हिंस्रैः भक्षितं ज्ञात्वा, मंत्र+शक्तितः तत्+कुक्षेः निष्काश्य ऐक्यं कृत्वा पूर्ववत् व्यधात्।५६।

तिचा आग्रह पाहून तिच्यावरील वात्सल्याने शुक्राचार्यांनी कचाला, तो देवगुरूंचा पुत्र असूनही शिष्य करून घेतले. कचानेही आपले गुरू शुक्राचार्यांची सर्व प्रकारे सेवा करून त्यांना प्रसन्न केले.५२. मात्र असुरांना हे कचाचे कपट लक्षात आले. त्यांनी एकदा संधी साधून कच समिधा आणायला वनात गेलेला असताना त्याला गाठून ठार केले. बराच उशीर होऊनही कच घरी न परतल्याने देवयानी अस्वस्थ झाली आणि आपल्या वडिलांना म्हणाली, 'कच अजून कसा आला नाही?' ५३. शुक्राचार्यांनी ध्यानाने कचाची हत्या झाल्याचे जाणले आणि संजीवनी मंत्राच्या प्रभावाने त्याला जिवंत करून घरी परत आणले. देवयानीला त्यामुळे आनंद वाटला.५४. दैत्यांनी पुन्हा कचाला ठार करून त्याचे मांस हिंस्र पशूंना खाऊ घातले. कच न दिसल्यामुळे शोक करणाऱ्या आपल्या मुलीला आश्वासित करून(५५) शुक्राचार्यांनी त्याला श्वापदांनी खाल्ल्याचे जाणले. मग त्याला त्या श्वापदांच्या पोटांतून पूर्णपणे काढले आणि एकत्र जोडून पुन्हा पहिल्याप्रमाणे जिवंत केले.५६.

**पुनर्दैत्याः कचं हुत्वा तद्भस्म मधुयोजितम् । ददुः शुक्राय प्रमादात् स पपौ दैत्यवत्सलः ।।५७।।**
**पुनः कन्यातिखिन्नाऽभूच्छुक्रो ज्ञात्वोदरस्थितम् । दैत्यान्छशाप ब्रह्मघ्नान् कन्यामाह स नाप्यते ।।५८।।**
**दैत्यैः क्षिप्तः स मत्कुक्षौ तदानयनतो हि मे । मृत्युर्भवेन्न को वेद दिव्यं मन्त्रं हि मां विना ।।५९।।**
**कन्योचे तात मे मन्त्रमुपादिश च जीवय । तं त्वां यदेष्यति मृतिर्जीवयामि सुमन्त्रतः ।।६०।।**
**नोचेत्प्राणांस्त्यजामीति निर्विण्णास्यै स मोहतः । दत्वा मन्त्रं जपित्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ ।।६१।।**

पुनः दैत्याः कचं हुत्वा तत्+भस्म मधु+योजितं शुक्राय ददुः। दैत्यवत्सलः सः प्रमादात् पपौ।५७। पुनः कन्या अति+खिन्ना अभूत्। शुक्रः (तं) उदर+स्थितं ज्ञात्वा ब्रह्मघ्नान् दैत्यान् शशाप। कन्यां आह, 'सः न आप्यते।५८। दैत्यैः सः मत्+कुक्षौ क्षिप्तः। तत्+आनयतः हि मे मृत्युः भवेत्। दिव्यं मंत्रं हि मां विना कः न वेद।'५८-५९। कन्या ऊचे। '(हे) तात, मे मंत्रं उपादिश च तं जीवय। यत् त्वां मृतिः एष्यति (अहं) सुमंत्रतः जीवयामि।६०। नो चेत् प्राणान् त्यजामि।' इति निर्विण्णा। सः अस्यै मोहतः मन्त्रं दत्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ।६१।

मग दैत्यांनी कचाला जाळून त्याचे भस्म केले आणि ते मधांत कालवून शुक्राला दिले. दैत्यांच्या वात्सल्याने शुक्राने फारशी चौकशी न करता ते पिऊनही टाकले.५७. त्या दिवशीसुद्धा कच आला नाही असे पाहून कन्या फारच खिन्न झाली. शुक्राचार्यांनी ध्यानाने पाहता तो आपल्याच पोटात असल्याचे त्यांना दिसून आले. तेव्हा दैत्यांनी केलेल्या ब्रह्महत्येने संतापून त्यांनी त्यांना शाप दिला आणि देवयानीला म्हणाले, 'तो आता कांही परत येणार नाही.५८. दैत्यांनी त्याला माझ्याच पोटात घातले आहे. त्याला आणले तर नक्कीच माझा मृत्यू होईल. आणि दिव्य संजीवनी मंत्र माझ्यावांचून कुणालाच येत नाही.'५९. देवयानी म्हणाली, 'बाबा! तो मंत्र मला शिकवा आणि कचाला जिवंत करा. तुम्हांला मृत्यू आल्यावर त्या संजीवनी मंत्राने मी तुम्हांला जिवंत करीन. अन्यथा मीच प्राणत्याग करीन!' असे कन्येचे निर्वाणीचे बोलणे ऐकून तिच्या ममतेने मोहित अशा शुक्राचार्यांनी मंत्राचा जप करून कचाला जिवंत केले आणि स्वतः मरण पावले.६०-६१.

**विदार्य जठरं प्राप्तं कचं दृष्ट्वा मृतं कविम् । मन्त्रेण जीवयामास तदाऽतेजाऽभवन्मनुः ।।६२।।**
**कृतकृत्यः कचो नत्वा गुरुं प्राह तदासुराः । घ्नन्ति मां तद्गृहं यास्ये मदर्थे भवतोऽप्यकम् ।।६३।।**
**सोऽपि गच्छेत्यादिदेश कन्योचे मत्पतिर्भव । मयैतदर्थमेव त्रिर्-जीवितोसि मृतोऽप्यहो ।।६४।।**
**कच ऊचे गुरोः कन्या स्वसाम्बास्वर्पणाच्च तत् । नोद्वाह्यातस्त्यजास्वर्ग्यं विरुद्धाग्रहमम्ब भोः ।।६५।।**
**सा विद्यां विस्मरेत्येनं शशापापि स तां नृपः । त्वां वरिष्यति मौर्ख्यात्ते नश्येन्मन्त्रो गुरोरिति ।।६६।।**

जठरं विदार्य प्राप्तं कचं दृष्ट्वा (देवयानि) मृतं कविं मन्त्रेण जीवयामास। तदा मनुः अतेजा अभवन्।६२। तदा कृतकृत्यः कचः गुरुं नत्वा प्राह। 'असुराः मां घ्नन्ति। तत् गृहं यास्ये। मत् अर्थे भवतः अपि अकम्।'६३। सः अपि 'गच्छ' इति आदिदेश। कन्या ऊचे, 'मत् पतिः भव। मया एतत् अर्थं एव त्रिः मृतः अपि जीवितः असि।'६४। कच ऊचे। 'गुरु+कन्या स्वसा। असु+अर्पणात् च अम्बा। तत् न उद्वाह्या। अतः भो अम्ब, अस्वर्ग्यं विरुद्ध+आग्रहं त्यज।'६५। सा एनं 'विद्या विस्मर' इति शशाप। सः तां, 'ते मौर्ख्यात् त्वां नृपः वरिष्यति। गुरोः मन्त्रः नश्येत्।' इति (शशाप)।६६।

आपल्या पित्याचे पोट फाडून कच बाहेर आलेला पाहताच देवयानीने मन्त्राने शुक्राचार्यांना जिवंत केले. मात्र त्यानंतर त्या मंत्राचे तेज लोप पावले.६२. तेव्हा आपला कार्यभाग साधलेला जाणून कचाने गुरू शुक्राचार्यांना वंदन केले आणि म्हणाला, 'हे दैत्य मला कांही जिवंत ठेवणार नाहीत. तेव्हा मी आपल्या घरी जातो. माझ्याकारणे आपल्यालाही खूप कष्ट झाले.'६३. शुक्राचार्यांनीही त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. तेव्हा देवयानी कचाला म्हणाली, 'तू माझा पती हो! याचसाठी तू मेलेला असताही तुला तीन वेळा मी जीवदान दिले.'६४. कच उत्तरला, 'तू गुरूंची कन्या असल्याने माझी बहीण लागतेस. मला जीवदान दिल्याने आता तू माझी माताच आहेस. तेव्हा आपला विवाह होऊ शकत नाही. तरी माते, हा अधःपातकारी शास्त्रविरुद्ध हट्ट तू सोड.'६५. तेव्हां तिने त्याला 'तू तुझी विद्या विसरशील!' असा शाप दिला. त्यानेही तिला उलट शाप दिला की, 'तुझ्या मूर्खपणाने तुझे लग्न राजाशी (क्षत्रियाशी) होईल आणि गुरुमहाराजांचा मंत्र नष्ट होईल.'६६.

मन्त्रोऽतेजास्तदैवाभूच्छुक्रो दीनत्वमापतत् । स्त्रियै मन्त्रस्ततोऽदेयः कार्यं गुर्वाज्ञया व्रतम् ।।६७।।

।। सावित्र्युवाच ।।

भगवन्सद्गुरो मन्त्रो यर्ह्यग्राह्यो हि योषिताम् । तर्ह्येकं व्रतमाख्याहि तारकं ते स्मृतिप्रदम् ।।६८।।

।। श्रीगुरुरुवाच ।।

सुलभं तारकं साध्वि सोमवारमहाव्रतम् । व्रतोत्तमं सुधामेष्ट-दं केऽप्यस्याधिकारिणः ।।६९।।

'तदा एव मन्त्रः अतेजा अभूत्। शुक्रः दीनत्वं आपतत्। ततः स्त्रियै मन्त्रः अदेयः। गुरु+आज्ञया व्रतं कार्यम्।'६७। सावित्री उवाच। '(हे) सद्गुरु भगवन्, यर्हि योषितां मन्त्रः अग्राह्यः तर्हि एकं तारकं ते स्मृतिप्रदं व्रतं आख्याहि।'६८। श्रीगुरुः उवाच। '(हे) साध्वि, सोम+वार+महा+व्रतं व्रतोत्तमं सुलभं तारकं सुधाम+इष्टदम्। सर्वे अपि अस्य अधिकारिणः।६९।

**स्त्रियांना मंत्राचा अधिकार आहे का?** तत्काळ तो संजीवनी मंत्र निस्तेज झाला आणि शुक्राचार्यांना दीनत्व आले. एवढ्यासाठी स्त्रियांना मंत्र देऊ नये. पूर्वीच्या युगात गोधा, घोषा, विश्ववारा इत्यादि ब्रह्मज्ञानी स्त्रियांचा उल्लेख आहे. *घोषा गोधा विश्ववारा, अपालोपनिषन्निषत्। ब्रह्मजाया जहुर्नाम अगस्त्यस्य स्वसा दिती।।८४।। इन्द्राणी चेन्द्रमाता च सरमा रोमशोर्वशी। लोपामुद्रा च नद्यश्च यमो नारी च शाश्वती।।८५।। श्रीर्लक्ष्मी सर्पराज्ञा वाक्श्रद्धा मेधा च दक्षिणा। रात्रि सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरितः।।८६।।* (बृहत् देवता अ. २४) तथापि सांप्रत कलियुगात स्त्रियांना मंत्राचा अधिकार नाही हा विशेष आहे. यावर असा आक्षेप घेता येईल की, गीतेत (९:३२) स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हेसुद्धा परम गती पावतात असे म्हटले आहे. मंत्राचा जर त्यांना अधिकार नसेल तर त्यांना मोक्ष कसा मिळेल? याचे समाधान श्लोकाच्या अंतिम चरणांत दिले आहे. त्यांनी व्रत करावे; पण तेही गुरूंच्या आज्ञेने, आपल्या स्वतंत्र बुद्धीने नाही. वितानकर्मांत (वितान=अथर्ववेदाचे परिशिष्ट) मात्र स्त्रियांना मंत्रपाठाचा आणि श्रवणाचा अधिकार आहे.६७.

**सीमन्तिन्या यत्प्रभावान् नष्टोऽप्याप्तः पतिः शृणु । प्राक् चित्रवर्मार्यावर्ते राजा शूरो वशी कृती ।।७०।।
धीरूपशीललक्ष्माढ्यां पुत्रीं लेभेऽजसेवया । शान्त्याद्याढ्या सती भर्त्रायुताब्दं राज्यभोक्त्र्यसौ ।।७१।।
इत्यूचुर्गणकास्त्वेको बाल्ये वैधव्यमित्यपि । राजा हृष्टोऽपि खिन्नोऽभूद् ववृधे सा सितेन्दुवत् ।।७२।।**

यत् प्रभावात् सीमन्तिन्या नष्टः अपि पतिः आप्तः (तत्) शृणु। प्राक् आर्यावर्ते चित्रवर्मा वशी कृती राजा (अभूत्)।७०। (सः) अज+सेवया धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्यां पुत्रीं लेभे। गणकाः, असौ शान्ति+आदि+आढ्या सती भर्त्रा अयुत अब्दं राज्य+भोक्त्री इति ऊचुः। एको, 'बाल्ये वैधव्यं' इति अपि। राजा हृष्टः अपि खिन्नः अभूत्। सा सित+इन्दु+वत् ववृधे।७१-७२।

त्यावर सावित्रीने प्रार्थना केली, 'अहो सद्गुरू भगवान, जर स्त्रियांना मंत्र घेता नाही तर मग आपण मला एक असे तारक व्रत सांगा ज्यायोगे मला आपले स्मरण राहील.' वरील गीताश्लोकांत स्त्रियादिकांना मोक्षासाठी आपला व्यपाश्रय (आधार) आवश्यक असल्याचे प्रतिपादन आहे. म्हणून ही सती गुरुस्मरणाची याचना विशेषत्वाने करीत आहे.६८. श्रीगुरू म्हणाले, 'हे सती, सोमवार हे महाव्रत सर्व व्रतांत उत्तम व्रत आहे. ते सुलभ, तारक, प्रभावी आणि इष्टकामना पुरविणारे आहे. हे व्रत कुणालाही - धर्मबाह्य यवनादिकांना सोडून, सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्रिया इत्यादींना करता येते. उमा म्हणजे अध्यात्मविद्या किंवा पार्वतीमाता, तिच्यासह असलेला सोम म्हणजे भगवान शंकर. त्यांचा वार म्हणजे आनंदवर्धक दिवस तो सोमवार. हे नित्यही करता येते किंवा काम्यही आहे त्यामुळे त्याला महाव्रत म्हटले आहे.६९. ज्या व्रताच्या प्रभावाने सीमन्तिनीला आपला मरण पावलेला पतीसुद्धा परत मिळाला त्याची कथा ऐक. पूर्वी आर्यावर्तात चित्रवर्मा सामर्थ्यशाली आणि प्रतापी राजा होता.७०. त्या राजाला भगवान शंकरांच्या उपासनेच्या फलस्वरूप एक मुलगी झाली. ती बुद्धिमान, रूपवान्, शीलवान आणि उत्तम लक्षणांनी युक्त अशी होती. तिच्या जन्माच्या वेळेनुसार ज्योतिष्यांनी भाकित वर्तविले की, 'ही कन्या शांती, दया, क्षमा आदि गुणांनी युक्त अशी सती असून आपल्या पतीसह दहा हजार वर्षे राज्य करील.' राजाला आनंद वाटला; पण तेवढ्यात एक ज्योतिषी असेही म्हणाला की, 'ही बालपणीच विधवा होईल.' राजाच्या आनंदावर विरजण पडल्यासारखे झाले. पुढे ती कन्या शुक्लपक्षाच्या चंद्रासारखी वाढू लागली.७१-७२.

**सा द्वादशाब्दिका श्रुत्वा वैधव्यं भावि दुःखिता । नत्वैकदाप्तां मैत्रेयीं साऽवैधव्यं स्म याचते ।।७३।।**
**तां साब्रवीत्सोमवार-व्रतात् त्रातास्ति शंकरः । प्रतीन्दुवारं संसेव्यो गोहृत्कायैः सदाशिवः ।।७४।।**
**उपोष्य नक्तं भुक्त्वा वा भक्त्यास्मिन्न क्षणं स्वपेत् । नश्येत्प्राप्तापि भीस्त्यक्ते व्रते कुप्येत शंकरः ।।७५।।**

सा द्वादश+अब्दिका भावि वैधव्यं श्रुत्वा दुःखिता। सा एकदा आप्तां मैत्रेयीं नत्वा अवैधव्यं याचते स्म।७३। सा तां अब्रवीत्। 'सोमवार+व्रतात् शंकरः त्राता अस्ति। प्रति इन्दुवारं गो+हृत्+कायैः सदाशिवः (सदा शिवः) उपोष्य, नक्तं भुक्त्वा वा भक्त्या संसेव्यः। अस्मिन् न क्षणं (अपि) स्वपेत्। प्राप्ता अपि भी नश्येत्। व्रते त्यक्ते शंकरः कुप्येत।७४-७५।

ती बारा वर्षांची असताना आपण विधवा होणार असल्याचे भविष्य तिच्या कानांवर पडले. त्यामुळे ती दुःखित झाली. एकदा घरी आलेल्या मैत्रेयीला शरण जाऊन तिने अवैधव्याची याचना केली. **'आप्तां'** या शब्दाचा अर्थ आलेल्या असाही होतो किंवा हितोपदेश करणारी ब्रह्मज्ञानी साध्वी असाही होतो.७३. मैत्रेयीने तिला सांगितले, 'सोमवार व्रत करणाऱ्याचे भगवान शंकर रक्षण करतात. दर सोमवारी इंद्रिये, मन आणि देह यांनी (कायावाचामने) उपास करून किंवा रात्री उपास सोडून भक्तिभावाने सदाशिवाची सेवा करावी. त्या दिवशी क्षणभरही झोपू नये. किंवा स्वयंप्रकाश अपरोक्षरूप शिवाच्या चिंतनात किंचितसुद्धा प्रमाद करू नये. अगदी समोर आलेले संकटही नाश पावते. एकदा घेतलेले व्रत टाकले तर मात्र शंकरांचा कोप होतो'. व्रताचे सातत्य टिकावे म्हणून हे शासन सांगितले आहे.७४-७५.

**पापक्षयोऽस्याभिषेकात् साम्राज्यं पीठपूजनात् । गन्धादिदानात्सौभाग्यं सौगन्ध्यं धूपदानतः ॥७६॥**
**दीपात्कान्तिर्भोज्यदानाद्भुक्तिस्ताम्बूलतो रमा । नत्या पुमर्था ऐश्वर्यं जपाद्ब्राह्मणभोजनात् ॥७७॥**
**सर्वतृप्तिः कोशवृद्धिर्होमाल्लभ्याखिलं स्तवात् । तद्व्रतं कुर्विति प्रोक्त्वा सागात्कन्याऽकरोद्व्रतम् ॥७८॥**
**भूयाद्भाव्येषा देयेति मत्वा चन्द्राङ्गदाय राट् । तां वरायानुरूपाय नलगोत्रभुवे ददौ ॥७९॥**
**गजाश्वदासराष्ट्रादि दत्वापि स्वपुरे मुदा । पुत्राभावात्स तं राजा मेने संस्थाप्य पुत्रवत् ॥८०॥**

अस्य अभिषेकात् पापक्षयः, पीठपूजनात् साम्राज्यं, गन्धादिदानात् सौभाग्यं, धूपदानात् सौगन्ध्यम्।७६। दीपात् कान्तिः, भोज्यदानात् भुक्तिः, ताम्बूलतो रमा, जपात् ऐश्वर्यं, ब्राह्मणभोजनात् सर्वतृप्तिः, होमात् कोशवृद्धिः, स्तवात् अखिलं लभ्य। तत् व्रतं कुरु इति प्रोक्त्वा सा अगात्। कन्या व्रतं अकरोत्।७७-७८। राट् 'भावि भूयात्, एषा देया' इति मत्वा तां अनुरूपाय वराय नल+गोत्र+भुवे चन्द्राङ्गदाय ददौ।७९। गज+अश्व+दास+राष्ट्र+आदि दत्वा अपि राजा पुत्र+अभावात् तं मुदा स्वपुरे संस्थाप्य पुत्रवत् मेने।८०।

आता सोमवारी केलेल्या शिवाच्या पूजनाची फळे सांगतात. शंकराला अभिषेक केल्याने पापक्षय होतो; पीठपूजनाने साम्राज्यप्राप्ती; सुगंधी पदार्थ अर्पण केल्याने सौभाग्य; धूप दिल्याने देह सुगंधी होतो; दीप दाखविल्याने शरीर तेजस्वी होते; नैवेद्य समर्पण केल्याने सर्व भोग मिळतात; विडा दिल्याने लक्ष्मीचा लाभ होतो; जपाने ऐश्वर्य येते; शिवप्रीत्यर्थ ब्राह्मण जेवू घातले तर सर्वांची तृप्ती; आणि होम केल्याने सर्व कांही प्राप्त होते. 'तरी तू हे व्रत कर.' असे सांगून मैत्रेयी निघून गेली. सीमन्तिनीने तिच्या उपदेशानुसार सोमवार व्रत सुरू केले.७६-७८.

यथाकाल आपली कन्या उपवर झालेली पाहून, 'जे होणार ते चुकेना' अशा विचाराने राजाने तिचा विवाह तिला अनुरूप अशा नलराजाच्या गोत्रातील चंद्रांगद नावाच्या वराशी केला.७९. राजाने जावयाला हत्ती, घोडे, दास-दासी, राज्य इत्यादि आंदण तर दिलेच. पण राजाला पुत्र नसल्याने त्याने चंद्रांगदालाच आपला पुत्रच मानून आपल्याच नगरीत ठेवून घेतले.८०.

**कालिन्द्यामेकदा क्रीडन्मज्जति स्म स तच्चराः । पितरौ श्वशुरौ गत्वा तदूचुस्तत एत्य ते ।।८१।।**
**अन्वेष्यापि न तं प्रापुः शोकं चक्रुस्तदाखिलाः । कन्यानुगन्तुमुत्कापि शवाभावान्निवारिता ।।८२।।**
**तामाश्वास्यानयद्राष्ट्रं चित्रवर्मा नृपः सुता । शोकार्ताप्यकरोत्प्रेम्णा सोमवारव्रतं शुभम् ।।८३।।**
**पुत्रशोकाकुलं त्विन्द्र-सेनं सस्त्रीकमुत्तमम् । खिन्नं संस्थाप्य कारायां तद्राज्यं बुभुजेऽहितः ।।८४।।**
**तं नागिन्योऽम्बुमग्नं स्वं लोकं नीत्वामृतोपमम् । सर्पेशाय ददुः सर्पेट् सुधया तं व्यजीवयत् ।।८५।।**

एकदां कालिन्द्यां क्रीडन् सः मज्जति स्म। तत्+चराः पितरौ श्वशुरौ गत्वा तत् ऊचुः। ततः ते एत्य अन्वेष्य अपि तं न प्रापुः। तदा अखिलाः शोकं चक्रुः। कन्या अनुगन्तुं उत्का अपि शव+अभावात् निवारिता।८१-८२। चित्रवर्मा नृपः तां आश्वास्य राष्ट्रं आनयत्। सुता शोक+आर्ता अपि शुभं सोमवारव्रतं प्रेम्णा अकरोत्।८३। पुत्र+शोक+आकुलं खिन्नं इन्द्रसेनं तु अहितः सस्त्रीकं कारायां संस्थाप्य तत्+राज्यं बुभुजे।८४। अम्बु+मग्नं तं नागिन्यः स्वं अमृत+उपमं लोकं नीत्वा सर्पेशाय ददुः। सर्पेट् तं सुधया व्यजीवयत्।८५।

एकदा तो चंद्रांगद यमुना नदीत जलक्रीडा करीत असता बुडाला. त्याच्या सहचरांनी ते वृत्त त्याच्या मातापित्यांना आणि सासूसासऱ्यांना जाऊन सांगितले. सगळ्यांनी तिथे येऊन नदीत त्याला खूप शोधले. पण तो कांही सापडला नाही. सगळे शोक करू लागले. सीमन्तिनी सहगमन करण्यास उत्सुक होती. पण प्रेत जवळ नसल्याने तिला सगळ्यांनी परावृत्त केले.८१-८२. तिची समजून घालून चित्रवर्मा राजाने आपल्या घरी आणले. शोकग्रस्त असूनही सीमन्तिनीने मंगलदायक सोमवारव्रत प्रीतीपूर्वक चालूच ठेवले.८३. पुत्राच्या शोकाने व्याकुळ आणि खिन्न झालेल्या इन्द्रसेन राजाला त्याच्या शत्रूंनी पत्नीसह कारागृहात टाकले आणि त्याचे राज्य बळकावून घेतले.८४. इकडे पाण्यात बुडालेल्या चंद्रांगदाला नागस्त्रियांनी पाहिला. त्यांनी त्याला पाताळात नेले आणि आपला राजा वासुकी याच्या ताब्यात दिले. नागराजाने त्याला अमृत पाजून जिवंत केले.८५.

**अलौकिकं पुरं नागान्दृष्ट्वा स चकितोऽभवत् । वासुकिः प्राह तं कस्त्वं कस्य भक्तोऽसि मे वद ।।८६।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**सच्छ्लोकनलवंशोत्थ इन्द्रसेनसुतोऽस्म्यहम् । चन्द्राङ्गदाभिधो राजा जामाता चित्रवर्मणः ।।८७।।**
**कालिन्द्यां पतितस्त्वत्र केनानीतो न वेद्मि तत् । दैवाद्वो दर्शनं जातं सफलं जन्म कर्म मे ।।८८।।**

सः अलौकिकं पुरं, नागान् दृष्ट्वा चकितः अभवत्। वासुकिः तं प्राह। 'त्वं कः? कस्य भक्तः असि? मे वद।'८६। चन्द्रांगद उवाच। 'अहं सत्+श्लोक+नल+वंश+उत्थ इन्द्रसेन+सुतः चन्द्रांगद+अभिधः राजा चित्रवर्मणः जामाता अस्मि।८७। (अहं) कालिन्द्यां पतितः। अत्र तु केन आनीतः तत् न वेद्मि। दैवात् वः दर्शनं जातम्। मे जन्म कर्म सफलम्।'८८।

ते पातालालोकातील अलौकिक नगर आणि तिथले सर्व नाग पाहून तो चंद्रांगद विस्मित झाला. वासुकीने त्याला विचारले, 'तूं कोण आहेस? आणि कुणाचा भक्त आहेस? मला सांग.' इथे अशी एक शंका उपस्थित होऊ शकते की कर्मकांडात हे व्रत आणि उपासना यांचा समावेश असंगत आहे. पण देवताज्ञानपूर्वक कर्म हे श्रेष्ठ मानलेले आहे. व्रताच्या निमित्ताने देवताज्ञानासहित (विद्या) कर्माचे (अविद्या) अनुष्ठान (*विद्यांचाविद्यां च*) श्रुतीच्या प्रतिपादनाला धरून आहे (ईश उ. ९:१२).८६. चंद्रांगद म्हणाला, 'मी पुण्यश्लोक नल राजाच्या वंशांत जन्मलेला इन्द्रसेन राजाचा पुत्र आहे; माझे नाव चंद्रांगद असून मी चित्रवर्मा राजाचा जावई आहे.'८७. 'कालिंदी नदीत मी बुडाल्याचे स्मरते; पण मला इथे कुणी आणले ते माहीत नाही. माझ्या सद्भाग्याने आपले दर्शन झाले. हे माझ्या जन्माचे सार्थकच झाले!'८८.

**सृष्ट्यादिहेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयोऽप्यजः । कैलासे मूर्तिमद्योऽस्ति शम्भुर्नः कुलदैवतम् ।।८९।।**

**।। वासुकिरुवाच ।।**

**पूतोऽस्यत्र पुरे तिष्ठ भुञ्जन्भोगानमानुषान् । सुधाकल्पद्रुपूर्णे रुक्-शुग्भीनिद्रालयोनिते ।।९०।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**मां तु मत्वा मृतं नद्यां पितरौ मे मरिष्यतः । शोकार्तापि वधूर्वर्षे वर्तमाने विवाहिता ।।९१।।**

'सृष्टि+आदि+हेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयः अजः यो कैलासे मूर्तिमत् अस्ति (सः) शंभुः नः कुलदैवतम्।'८९। वासुकिः उवाच। 'पूतः असि! अत्र सुधा+कल्प+द्रु+पूर्णे शुक्+भी+निद्रा+लय+ऊनिते पुरे अमानुषान् भोगान् भुञ्जन् तिष्ठ।'९०। चन्द्राङ्गद उवाच। 'मे पितरौ मां तु नद्यां मृतं मत्वा मरिष्यति। शोकार्ता वधूः अपि वर्तमाने वर्षे विवाहिता।'९१।

मग चंद्रांगद आपण कुणाचे भक्त ते सांगत आहे. त्यातून त्याची आध्यात्मिक प्रगल्भता दृग्गोचर होते. तो म्हणतो, 'जगताच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचे कारण असणारा, मायेचाही नियंता, सर्व जीवमात्रांच्या अंतरांत राहून त्यांचे नियंत्रण करणारा, जीवापासून अभिन्न असा साक्षी, चैतन्यरूप आणि निर्विकार भगवान शिव, जो कैलासावर मूर्तरूपाने राहतो तोच आमचे कुलदैवत आहे. यावरून मूर्तिमंत शंकर मानवांना दृग्गोचर नसले तरी त्यांची उपासना परंपरेने आमच्या कुलांत चालत आलेली आहे असे सांगितले आहे. 'जो ज्याची उपासना करतो तो त्याच्यासारखाच होतो', या मुद्गल उपनिषदाच्या (३ः३) वचनानुसार चंद्रांगद हा शिवसायुज्याचा अधिकारी ठरतो.८९. वासुकी हे ऐकून प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'तू पावन आहेस. इथे पाताललोकातच राहून अलौकिक भोगांचा भोग घे. इथे अमृताचे साठे आहेत, कल्पवृक्षाच्या बागा आहेत. शोक, भय, निद्रा आणि मृत्यू यांची इथे वार्ताही नाही.'९०. चंद्रांगद उत्तरला, 'माझे मातापिता मी नदीत बुडून मेलो असे समजून प्राण देतील. माझे या वर्षीच लग्न झाले आहे. माझी शोकाकुल पत्नीसुद्धा माझ्याविना जगू शकणार नाही.'९१.

**श्रुत्वेति चेद्व्रजेत्युक्त्वा रत्नभूषामृतादिकम् । दत्वाऽह्यश्वौ मनोवेगौ गमयामास तौ स तु ।।९२।।**
**स ससर्पोऽश्वमारुह्य गच्छन् प्रेक्ष्य मनोजवः । कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं जगौ ।।९३।।**
**वधूः कस्यासि कन्या त्वं शोकार्तासि कुतोऽङ्गने । सा तच्छ्रुत्वा सखीं प्राह कथयास्मै सविस्तरम् ।।९४।।**

**।। सख्युवाच ।।**

**चन्द्राङ्गदवधूश्चित्र-वर्मकन्येयमत्र तु । प्रियो नष्टस्तच्छुगार्ता स्नात्यत्राद्यास्ति सद्व्रतम् ।।९५।।**

(वासुकिः) इति श्रुत्वा 'व्रज' इति उक्त्वा मनो+वेगौ अहि+अश्वौ, रत्न+भूषा+अमृतादिकं दत्वा तौ गमयामास।९२। सः ससर्पः अश्वं आरुह्य मनोजवः कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं प्रेक्ष्य जगौ।९२। '(हे) अङ्गने, त्वं कस्य वधूः, कन्या असि? कुतः शोक+आर्ता असि?' सा तत् श्रुत्वा सखीं प्राह, 'अस्मै सविस्तरं कथय।'९३। सखी उवाच। 'इयं चन्द्राङ्गद+वधूः चित्रवर्म+कन्या। अत्र तु प्रियः नष्टः। तत्+शुक्+आर्ता। अद्य सत्+व्रतं अस्ति। (अतः) अत्र स्नाति।९५।

हे ऐकून वासुकी म्हणाला, 'मग तुला जायला पाहिजे.' त्याने त्याच्या साह्याकरता एक सर्प आणि मनासारखा वेगवान घोडा दिला. शिवाय दिव्य रत्ने, भूषणे, अमृत इत्यादि भेटीही दिल्या आणि त्या दोघांना निरोप दिला.९२. त्या नागाला बरोबर घेऊन घोड्यावर बसून तो चंद्रांगद मनोवेगाने कालिंदी नदीच्या तीरावर पोचला. त्या दिवशी नेमका सोमवारच असल्याने व्रताच्या अनुष्ठानासाठी सीमन्तिनीही तिथे आली होती. तिला सौभाग्यालंकारविरहित विधवेच्या वेषात पाहून तो खिन्न झाला. त्याने तिला विचारले.९३. 'बाईसाहेब, आपले पती कोण आहेत. पिता कोण आहेत? आणि आपण इतक्या दुःखीकष्टी का आहात?' त्यावर तिने आपल्या सहचरींना त्याला सर्व सविस्तर सांगायला सांगितले.९४. तिच्या सख्यांनी त्याला सांगितले, 'ही चंद्रांगदाची पत्नी आणि चित्रवर्म्याची कन्या आहे. इथेच ह्या नदीत तिचा पती बुडून मरण पावला. त्यामुळे ती शोकपीडित आहे. आज सोमवारचे व्रत असल्याने ही इथे स्नानासाठी आली आहे.९५.

**कारायां श्वशुरावस्याः संस्थाप्य बुभुजे स्वयम् । राज्यं रिपुः सोमवार-व्रतमेषा करोत्यतः ।९६।।**
**सीमन्तिन्यपि तद्रूपं दृष्ट्वा स्वपतिसन्निभः । कोऽयं धूर्तोऽसि यक्षो वा भाति वा स्वप्नहृद्भ्रमः ।।९७।।**
**इति मत्वा शुशोचैनामाश्वास्याहैष्यति त्र्यहात् । पुण्याद्भर्ता तवेत्युक्त्वा राष्ट्रं चन्द्राङ्गदो ययौ ।।९८।।**
**सापि तूष्णीं ययौ राष्ट्रं पितुश्चन्द्राङ्गदस्त्वरिम् । स्वागमं श्रावयामास स भीतो मुक्तवान्नृपम् ।।९९।।**
**द्विषा क्षमापितो मुक्तश् चन्द्रसेनः समागतम् । श्रुत्वा नष्टं सुतं वध्वा प्रेमाश्रूत्तोऽभवत्क्षणात् ।।१००।।**

अस्याः श्वशुरौ कारायां संस्थाप्य रिपुः स्वयं राज्यं बुभुजे। अतः एषा सोमवारव्रतं करोति।'९६। सीमंतिनी अपि तत्+रूपं दृष्ट्वा 'स्व+पति+सन्निभः कः अयं? धूर्तः अस्ति? यक्षः वा? स्वप्न+हृत्+भ्रमः वा भाति?'९७। इति मत्वा शुशोच। एनां आश्वास्य चन्द्राङ्गदः आह। 'तव पुण्यात् तव भर्ता त्रि+अहात् एति।' इति उक्त्वा (सः) राष्ट्रं ययौ।९८। सा अपि तूष्णीं पितुः राष्ट्रं ययौ। चन्द्राङ्गदः अरिं स्व+आगमं श्रावयामास। स भीतः नृपं मुक्तवान्। द्विषा क्षमापितः मुक्तः चन्द्रसेनः समागतं श्रुत्वा (नृपः) वध्वा प्रेम+अश्रूत्तः अभवत्।९९।

हिच्या सासूसासऱ्यांना बंदीशाळेत टाकून शत्रूंनी त्यांचे राज्य बळकावले आहे. तरी ही सोमवार व्रत करीत असते.'९६. त्या वेळी सीमंतिनीने त्याचे रूप निरखून पाहिले तेव्हां, 'हा आपल्या पतीसारखाच दिसतो आहे. कोण असेल हा? कुणी तोतया किंवा यक्ष असेल का? की माझ्या मनाचा हा खेळ नसेल ना? की हे स्वप्नच आहे?'९७. अशा विचारांनी कासावीस होऊन ती रडू लागली. चंद्रांगदाने तिचे सांत्वन केले. म्हणाला, 'शोक करू नकोस. तुझ्या पुण्याईने तुझा पती तीन दिवसात परत येईल.' असे बोलून तो आपल्या राज्याकडे निघून गेला.९८. तीसुद्धा आपल्या पित्याच्या नगरीला परतली. पण ही हकीकत तिने कुणालाही सांगितली नाही. चंद्रांगदाने आपले राज्य बळकावलेल्या शत्रूंना आपल्या आगमनाची सूचना दिली. त्यांनी घाबरून इंद्रसेन राजाला कारागृहातून सोडले(९९) आणि त्याची क्षमा मागितली. राजा आणि राणी चंद्रांगदाच्या आगमनाची वार्ता ऐकून आनंदाने गहिवरले.१००.

**अलङ्कृतं पुरं सोऽपि प्रविश्य पितरौ दृढम् । समालिङ्ग्यादितः सर्वं शशंस पुलकाङ्कितः ।।१०१।।**
**सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्पित्रनुज्ञया । गत्वा श्वशुरराष्ट्रं स्व-भार्याशोकं जहार सः ।।१०२।।**
**आनीतानर्घवस्तूनि तस्यै दत्वा तया सह । राज्यमेत्याभिषिक्तः स जिष्णुवद्बुभुजे श्रियम् ।।१०३।।**
**इयान् व्रतप्रभावस्तद्-व्रतं कुर्वित्यजोऽब्रवीत् । ततः प्रभृत्युभौ भक्त्या चेरतुर्व्रतमुत्तमम् ।।१०४।।**
**गुर्वाज्ञयेयितुर्गेहं प्रत्यब्दं गुरुदर्शनम्। कृत्वा श्रीपुत्रपौत्राढ्यावुभयीं सिद्धिमापतुः ।।१०५।।**

सः अपि अलङ्कृतम् पुरं प्रविश्य पितरौ दृढं समालिङ्ग्य पुलकाङ्कितः सर्वं आदितः शशंस।१०१। सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्। पितृ+अनुज्ञया श्वशुर+राष्ट्रं गत्वा सः भार्या+शोकं जहार।१०२। आनीत+अनर्घ+वस्तूनि तस्यै दत्वा तया सह राज्यं एत्य अभिषिक्तः सः जिष्णुवत् श्रियं बुभुजे।१०३। इयान् व्रत+प्रभावः। 'तत् व्रतं कुरु।' इति अजः अब्रवीत्। ततः प्रभृति उभौ उत्तमं व्रतं भक्त्या चेरतुः।१०४। गुरु+आज्ञया गेहं ईयतुः। प्रति अब्दं गुरु+दर्शनं कृत्वा उभयीं सिद्धिं आपतुः।१०५।

चंद्रांगदही सजविलेल्या नगरात प्रवेश करून मातापित्यांना कडकडून भेटला. प्रेमभराने त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्याने त्यांना सर्व हकीकत सविस्तर निवेदन केली.१०१. आपल्यासोबत आलेल्या सर्पाचा सत्कार करून त्याला त्याच्या राज्याला - पाताळाला बोळविले. नंतर आपल्या वडिलांची अनुज्ञा घेऊन सासऱ्याच्या राज्याला जाऊन त्याने आपल्या पत्नीचे दुःख निवारण केले.१०२. पाताळातून आणलेल्या मौल्यवान वस्तू तिला देऊन तिला प्रसन्न केले. नंतर तिला घेऊन तो आपल्या नगरीला परतला. तिथे इंद्रसेनाने त्याला राज्याभिषेक केला. अशा रीतीने त्याने सीमन्तिनीसह इंद्राप्रमाणे ऐश्वर्य भोगले.१०३. ही कथा सांगून श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, 'असा हा सोमवारव्रताचा प्रभाव आहे. तरी तू हे व्रत कर!' तेव्हापासून ती दोघे दंपती त्या उत्तम व्रताचे आचरण करू लागले.१०४. नंतर श्रीगुरूंची आज्ञा घेऊन ते आपल्या घरी माहुरला गेले. दर वर्षी त्यांचा श्रीगुरूंच्या दर्शनाला येण्याचा नियम होता. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही सिद्धी त्यांना लाभल्या.१०५.

**एवं जगन्मङ्गलमङ्गलात्मा मनुष्यभावात्परिगृह्य भक्तान् ।**
**सञ्चारपूतां जगतीं विधाय ततान लीलाममलामघघ्नीम् ।।१०६।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे दम्पतीगुरुसंवादो नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः सप्तदशोऽध्यायः ।।१७।।**

**सप्ताहपारायणे चतुर्थः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम्। द्वितीयदिने आरम्भे श्रीगुरुस्तुतिः।**

एवं जगत्+मङ्गल+मङ्गल+आत्मा मनुष्य+भावात् जगतीं सञ्चार+पूतां विधाय अमलां अघघ्नीं लीलां ततान।१०६।

अशा प्रकारे जगाला सुखवणाऱ्या आनंदस्वरूप परमात्म्याने मनुष्यरूपाने भक्तांचा उद्धार करीत संचार करून ह्या भूतलाला पावन केले आणि आपल्या सर्व पावक आणि पापहारी लीलांचा विस्तार केला.

**समारोप -** सुवासिनींना पातिव्रत्यधर्मानेच ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधते, दुसरा कोणताही धर्म नाही; तसेच पतीच्या मृत्यूनंतर सहगमन हाच स्त्रीचा मुख्य धर्म आहे. ते शक्य नसेल तर तिने वैधव्यधर्माचे पालन करावे. तसे केल्याने निपुत्रिक स्त्रीलासुद्धा ब्रह्मचाऱ्यासारखी स्वर्गप्राप्ती होते. हे सर्व प्रतिपादन मागच्या (सोळाव्या) अध्यायात केले या अध्यायात संवादरूपाने स्त्रियांना मंत्राचा अधिकार नसला तरी व्रताच्या आचरणाने उभयतः कल्याण होते असे सांगून **स्त्रियांना मोक्षप्राप्तीमध्ये स्वातंत्र्य** आहे असे स्पष्ट केले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला चौथा आणि प्रथमपासून सतरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अष्टादशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**निद्रितं मोहतम्यां मे मनोऽहङ्कारघूर्णितम् । बोधार्कोदयबुद्धं तत् पातुमैच्छत्कथामृतम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**वत्स विष्णौ प्रबुद्धोऽसि यत्तृप्तिः शृण्वतोऽपि नो । मन्ये त्वयि प्रसादोऽस्ति श्रीमद्भगवतो हरेः ।।२।।**

**शृण्वेको ब्राह्मणस्तत्र त्यक्तान्यान्नप्रतिग्रहः । दैवाप्तभुगृती शान्तोऽसक्तः कर्मपरो गृही ।।३।।**

नामधारक उवाच। मोह+तम्यां निद्रितं अहङ्कार+घूर्णितं मे मनः बोध+अर्क+उदय+बुद्धं तत् कथा+अमृतं पातुं ऐच्छत्।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स विष्णौ प्रबुद्धः असि यत् शृण्वतः अपि नो तृप्तिः। श्रीमत्+भगवतः हरेः त्वयि प्रसादः अस्ति (इति) मन्ये।२। शृणु। तत्र एकः त्यक्त+अन्न+प्रतिग्रहः दैव+आप्त+भुक् ऋती शान्तः असक्तः कर्मपरः गृही ब्राह्मणः (अभूत्)।३।

श्रीगणेशाय नमः। अथाऽष्टादशोध्यायः। *ब्राह्मणीचा स्वभाव सुधारुनि अठराव्यांत। सांगती अखिल कर्मकांड श्रीगुरुनाथ।।१।।* नामधारक म्हणाले, ‘मोहरूपी रात्रीत झोपलेले - आत्मस्वरूपाला विसरलेले, माझे मन आपल्या बोधरूपी सूर्याच्या उदयाने जागे झाले आहे. भानावर आले आहे. त्यामुळे मी श्रीगुरूंच्या लीलारूपी अमृताच्या पानाला उत्सुक झाले आहे.’१. सिद्ध म्हणतात, ‘बेटा! ज्या अर्थी इतका वेळ श्रवण करूनही तुला तृप्ती न वाटता अधिकच ऐकण्याची इच्छा होते आहे त्या अर्थी तू खरेच व्यापक श्रीगुरूंच्या विषयी जाग्रत झाला आहेस. तुझ्यावर त्या हरीचा, भगवंताचा कृपाप्रसाद झाला आहे असे मला वाटते.’२. ऐक तर! तिथे गाणगापुरात परान्नाचा त्याग केलेला, दैवाने मिळेल तेच संतोषाने सेवन करणारा, सत्यवचनी, शांत, कर्मनिष्ठ पण अनासक्त वृत्तीचा एक गृहस्थ ब्राह्मण राहत होता.३.

**तत्स्त्रीः कृत्येव सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वान्यसद्मनि । लभन्ते स्वंशुकार्थास्तद् दृष्ट्वा पतिमगर्हयत् ।।४।।**
**भोक्तुं भर्त्रा सहाहूता धनिनैकेन सैकदा । पत्याऽक्रुट्कामलोभेन निषिद्धैत्यावदद्गुरुम् ।।५।।**
**दीनां कुचैलां क्षुधितां पत्या साकं धनी गृहे । दाताह्वयति भोक्तुं मां पतिं बोधय नैति सः ।।६।।**
**तच्छ्रुत्वाहूय तं गच्छ भोक्तुं वध्वेत्यजोऽब्रवीत् । स प्राह नियमं हित्वा तथा कुर्वे त्वदाज्ञया ।।७।।**

तत्+स्त्रीः कृत्या इव। अन्य+सद्मनि सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वा सु+अंशुकाः अर्थान् (च) लभन्ते। तत् दृष्ट्वा पतिं अगर्हयत्।४। सा एकदा भर्त्रा सह भोक्तुं आहूता। अ+क्रुट्+काम+लोभेन पत्या निषिद्धा। (सा) गुरुं एत्य अवदत्।५। दीनां कुचैलां क्षुधितां मां धनी दाता पत्या साकं गृहे आह्वयति। सः न एति। पतिं बोधय।६। तत् श्रुत्वा अजः तं आहूय अब्रवीत् वध्वा भोक्तुं गच्छ। सः प्राह, नियमं हित्वा त्वत्+आज्ञया तथा कुर्वे। ७।

त्याची पत्नी मात्र कर्कशा आणि दुष्ट स्वभावाची होती. गाणगापूरला येणाऱ्या श्रीमंत लोकांकडे जाऊन सगळे गोडधोड खातात; शिवाय त्यांना चांगलीचुंगली वस्त्रे आणि दक्षिणाही मिळते हे पाहून तिला कुणाचेही निमंत्रण न स्वीकारणाऱ्या आपल्या नवऱ्याचा तिरस्कार वाटत असे.४. तिला एकदा एका धनवंताने पतीसह भोजनाचे आमंत्रण दिले. तिच्या क्रोध-काम-लोभरहित पतीने तिला जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हा ती श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना नवऱ्याचे गाऱ्हाणे सांगू लागली.५.

'पहा ना गुरुमहाराज! आम्ही कायमचेच दरिद्री आहोत. ना पोटभर अन्न ना अंगभर वस्त्र कधी असते! आज एका दानशूर श्रीमंताने त्याच्या घरी आम्हाला दोघांना जेवायला बोलावले आहे. पण हे कांही ऐकायलाच तयार नाहीत. तुम्हीच त्यांना सांगा. कधी तरी पोटभर गोडधोड खायला मिळेल!'६. तिचे ते बोलणे ऐकून श्रीगुरूंनी तिच्या पतीला बोलावून घेतले आणि त्याला आपल्या पत्नीसह भोजनाला जायला सांगितले. तो म्हणाला, 'मी माझा नियम मोडूनसुद्धा आपल्या आज्ञेचे पालन करीन.'७.

**इत्युक्त्वागात्तया भोक्तुं श्वक्रोडोच्छिष्टपाकतः । भुञ्जन्ती ददतेऽन्नं सा दृष्ट्वा पत्ये शशंस तत् ।।८।।**
**उत्थायोभौ ततः खिन्नौ गुरुं प्राप्य तदूचतुः । स प्राहाङ्गाद्य लब्धं ते स्त्रीः परान्नसुखं परम् ।।९।।**
**सोचेऽद्य च्छलितो भर्ता क्षन्तव्यो मन्तुरद्य मे । तामाह श्रीगुरुरितः पत्यनुज्ञानुगा भव ।।१०।।**

**।। विप्र उवाच ।।**

**निष्ठाऽन्यथा कृता मेऽद्य दुष्टयाघं कथं व्रजेत् । जन्मप्रभृत्यद्य यावन् नेदृक्पापं मया कृतम् ।।११।।**

इति उक्त्वा तया भोक्तुं अगात्। भुञ्जन्ती सा श्व+क्रोड+उच्छिष्ट+पाकतः अन्नं ददते (इति) दृष्ट्वा तत् पत्ये शंशस।८। ततः उभौ खिन्नौ उत्थाय गुरुं प्राप्य तत् ऊचतुः। सः प्राह। (हे) अङ्ग स्त्रीः अद्य ते परं परान्न+सुखं लब्धं (किम्)?९। सा ऊचे। 'अद्य (मया) भर्ता छलितः। मे मन्तुः क्षन्तव्यः।' श्रीगुरुः तां आह। 'इतः पति+अनुज्ञा+अनुगा भव।'१०। विप्र उवाच। 'अद्य दुष्टया मे निष्ठा अन्यथा कृता। अघं कथं व्रजेत्? जन्म+प्रभृति अद्य यावत् ईदृक् पापं मया न कृतम्।'११।

असे बोलून तो ब्राह्मण आपल्या स्त्रियेसह जेवायला गेला. तिथे जेवताना तिला दिसले की कुत्र्यांनी आणि डुकरांनी उष्टावलेले अन्नच वाढण्यात येत आहे. तिने ते आपल्या पतीला सांगितले.८. तेव्हा ते दोघेही जेवण टाकून उठले आणि श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना ते सर्व वृत्त सांगितले. ते म्हणाले, 'बाई गं! तुला आज परान्नभोजनाचे परमसुख मिळाले ना?'९. ती म्हणाली 'आज मी खरोखर पतीचा छळ केला. माझ्या ह्या अपराधाची क्षमा असावी.' त्यावर श्रीगुरू तिला म्हणाले 'इथून पुढे तू पतीच्या आज्ञेत राहा.'१०.

तो ब्राह्मण म्हणाला, या दुष्ट स्त्रीने माझ्या नियमाचा भंग करविला. आता हे पाप कसे जाईल? मी जन्मापासून आजपावेतो असे पाप केले नव्हते.११.

|| श्रीगुरुरुवाच ||

**मा भीस्त्वय्येष दोषो न दुश्चित्तं न कुलस्त्रियः । कार्यं सातः परं नेच्छेत् तथात्तुं क्वापि नैह्यतः ||१२||**
**कदाचिद्यस्य कस्यापि कर्माभाव उपस्थिते । द्विजाभावात्तु भोक्तव्यं तत्र दोषोऽन्यथा भवेत् ||१३||**

|| विप्र उवाच ||

**परान्नं कस्य भोक्तव्यं कस्मिन्गेहे न कुत्र वा । कस्माद्दानं गृहीतव्यं निषिद्धं चापि शंस मे ||१४||**

|| श्रीगुरुरुवाच ||

**सद्विप्रवैदिकगुरुश्वशुरस्वशिष्य-मातामहालय उ भोजनतो न दोषः ।**
**नाऽचारहीनपरकर्मरताहितार्त-क्षुद्राशुचिस्वगुरुदुःखकरान्नमद्यात् ||१५||**

श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। एष त्वयि न दोषः। कुलस्त्रियः दुश्चित्तं न कार्यम्। सा अतः परं तथा न इच्छेत्। (त्वं) अतः (परं) क्व अपि अत्तुं न एहि।'१२। 'कदाचित् यस्य कस्य अपि द्विज+अभावात् कर्म+अभाव उपस्थिते तु भोक्तव्यम्। अन्यथा तत्र दोषः भवेत्।'१३। विप्र उवाच। परान्नं कस्य भोक्तव्यम्? कस्मिन् गेहे कुत्र वा न (भोक्तव्यम्)? कस्मात् दानं गृहीतव्यम्? (कस्मात्) निषिद्धम्? मे शंस।१४। श्रीगुरुः उवाच। 'सद्विप्र+वैदिक+गुरु+श्वशुर+स्व+शिष्य+मातामह+आलये भोजनतः न दोषः। आचारहीन+परकर्मरत+अहितार्त+क्षुद्र+स्व+गुरु+दुःख+कर+अन्नं न अद्यात्।'१५।

श्रीगुरू म्हणाले, 'हा दोष तुला लागणार नाही; कारण आपल्या धर्मपत्नीचे मन राखायला हवे. तीसुद्धा यापुढे तशी धर्मविरुद्ध इच्छा करणार नाही. तूसुद्धा यानंतर कुणाकडेही जेवायला जाऊ नकोस.१२. मात्र याला अपवाद आहे. एखाद्याचे श्राद्धादि कर्म भोजनाला ब्राह्मण न मिळाल्याने जर अडले असेल तर मात्र तिथे जेवायला हवे. अन्यथा म्हणजे कर्मलोपावाचून इतर कारणाने - जिभेचे चोचले पुरविण्यासाठी जेवल्यास मात्र दोष आहे. किंवा तिथे कर्मलोप होत आहे हे जाणूनही दुराग्रहाने न जेवल्यासही दोष लागतो.'१४. ब्राह्मणाने विचारले की, गुरुमहाराज! कुणाकडचे परान्न पवित्र असते? कुणाकडे घ्यावे आणि कुणाकडे घेऊ नये? तसेच कुणाचे दान घ्यावे आणि कुणाचे निषिद्ध आहे? ते आपण मला सांगावे. श्रीगुरू म्हणाले, 'सदाचारी ब्राह्मण अध्यापक; अन्नदाता, भयहर्ता इत्यादि, गुरू; सासरा; बांधव;

**दातारमेति सततं सुकृतं तदन्न-भुक्त्यास्य भोक्तुरघमेति तथाप्यमन्त्रात् ।**
**हूत्याङ्घ्रिजस्य च तथा खलु मासपुण्यं दर्शे परान्नग्रहणादपयाति भोक्तुः ।।१६।।**
**कन्यालयेऽर्भजननोत्तरमन्नमद्याल् लक्ष्मीरपैति सततं परगेहवासात् ।**
**ग्राह्यं च दानमपि सज्जनतो ग्रहे सत् क्षेत्रादिके न न कुहाप्यतिनिन्द्यदानम् ।।१७।।**
**उत्तमं यज्ञशिष्टान्नं दीक्षितब्रह्मिणोरपि । स्वार्थं पक्तं क्वापि नाद्याद्याद्यज्ञार्पितं शुभम् ।।१८।।**

सततं तत्+अन्न+भुक्त्या भोक्तुः सुकृतं दातारं एति। अस्य अघं (भोक्तुं) एति। अङ्घ्रिजस्य हूत्या तथा एव। दर्शे परान्न+ग्रहणात् भोक्तुः मास+पुण्यं अपयाति।१६। कन्या+आलये अर्भ+जनन+उत्तरं अद्यात्। सततं पर+गेह+वासात् लक्ष्मीः अपैति। सज्जनतः दानं ग्राह्यम्। क्षेत्रादिके न सत्। अतिनिन्द्यदानं न कुह अपि।१७। यज्ञ+शिष्ट+अन्नं उत्तमम्। दीक्षित+ब्रह्मिणोः अपि। स्व+अर्थं पक्तं क्व अपि न अद्यात्। यज्ञ+अर्पितं शुभं (अन्नं) अद्यात्।१८।

शिष्य; मातामह यांच्या घरी जेवल्यास दोष नाही. मात्र आचारहीन, परकर्मांत रमणारा, लोभादि रिपूंनी अभिभूत झालेला, कृपण, आपल्या कुटुंबीयांना किंवा गुरूंना कष्ट देणारा यांचे अन्न घेऊ नये.'१५. सतत एखाद्याच्या घरी जेवण घेतल्याने जेवणाऱ्याचे पुण्य जेवू घालणाऱ्याला जाते; तसेच त्याचे पाप जेवणाऱ्याला जाते. शूद्राकरवी ब्राह्मणाच्या घरचे भोजनाचे आमंत्रण आल्यास त्याचप्रमाणे पुण्य-पाप जाते-येते. दर्शादिवशी (अमावास्या) परान्न घेतले तर महिन्याभराचे पुण्य अन्नदात्याला जाते व त्याचे पाप आपल्याला येते.१६. मुलीच्या घरी तिला एक अपत्य झाल्यावर जेवावे. सतत दुसऱ्याच्या घरी राहण्याने लक्ष्मी जाते. सत्प्रवृत्त, स्वधर्मनिष्ठ व्यक्तीकडून दान घ्यावे. पण ते तीर्थाच्या वा क्षेत्राच्या ठिकाणी अथवा ग्रहणादि पर्वांत घेऊ नये. निंद्य दान किंवा महादान कधीही घेऊ नये. सुवर्ण, हत्ती, घोडा, तीळ, दासी, रथ, भूमी, घर, वधू आणि कपिला गाय ही अग्निपुराणात महादाने सांगितली आहेत.१७. यज्ञांत अर्पण करून उरलेले अन्न उत्तम होय. तसेच अग्निहोत्रादि दीक्षा घेतलेल्या ब्राह्मणाचे अन्नही उत्तमच आहे. केवळ आपल्यासाठी शिजवलेले अन्न कुणीही घेऊ नये. यज्ञात अर्पण केलेले पवित्र अन्नच घ्यावे.१८.

**नश्येज्जपादापदि दानदोषः स्वाचारमप्यापदनापदिष्टम् ।**
**विविच्य विप्राः प्रचरन्ति ये न क्काप्याधिदैन्यर्णगदान्स्पृशन्ति ।।१९।।**
**स्वाचारहीनाः परकर्मसक्तास्तेऽमुत्र चात्रापि सदार्तिभाजः ।**
**तस्माद् द्विजाचारममुं निराशीस् त्वं कर्तुमर्हस्युभयार्थदं वै ।।२०।।**

**।। विप्र उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ दयाब्धे भगवन्प्रभो । सद्गुरो सर्वमाचारं वक्तुमर्हसि मे हरे ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**विस्तृतोऽब्धिवदाचारो मुनीनामपि दुर्ग्रहः । तस्मात्सारं सद्गतिदं वक्ष्ये शाक्त्यादिसंमतम् ।।२२।।**

आपदि दान+दोषः जपात नश्येत्। स्व+आचार अपि आपत्+अनापत्+इष्टं विविच्य ये विप्राः प्रचरन्ति (ते) क्क अपि आधि+दैन्य+ऋण+गदान् स्पृशन्ति।१९। स्व+आचार+हीनाः पर+कर्म+सक्ताः ते अमुत्र च अत्र अपि सदा आर्ति+भाजः। तस्मात् (हे) द्विज, अमुं आचारं त्वं निराशीः कर्तुं अर्हसि। (तत्) वै उभय+अर्थदम्।२०। विप्र उवाच। '(हे) देवदेव, (हे) जगन्नाथ, (हे) भगवन्, (हे) प्रभो, (हे) सद्गुरो (हे) हरे! मे सर्वं आचारं वक्तुं अर्हसि।'२१। श्रीगुरुः उवाच। 'अब्धिवत् विस्तृतः आचारः मुनीनां अपि दुर्ग्रहः। तस्मात् सद्गतिदं शाक्त्य+आदि+संमतं सारं वक्ष्ये।२२।

संकटामुळे घडलेल्या परिग्रहाचा दोष गायत्रीजपाने किंवा '*पुनर्मामैतु*' इत्यादि दोन मंत्रांच्या जपाने जातो. (आश्वलायन गृह्यसूत्र ३:६:९-१) संकटांत किंवा संकट नसताना कोणता आचार इष्ट आहे ह्याचा विचार करून जे ब्राह्मण वागतात त्यांना, मानसिक आधि, दारिद्र्य, ऋण किंवा रोगराई स्पर्शही करू शकत नाहीत.१९. आपल्या विहित आचाराचा त्याग करून दुसऱ्याचे कर्मांत रमणारे या भूलोकांत किंवा परलोकांतही दुःखच पावतात. त्यासाठी हे ब्राह्मणा, हा आचार तू निष्काम रीत्या करावास. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिकही कल्याण साधते.२०. यावर त्या ब्राह्मणाने महाराजांची प्रार्थना केली, 'देवाधिदेवा, जगदीशा, भगवंता, दयासागरा, समर्था, सद्गुरो! आपण मला सर्व आचार सांगावा!'२१.

**आचार आद्यो धर्मो नुः सुखदस्तूभयत्र सः । श्रुतिस्मृतिपुराणोक्त-चरणं विष्णुचिन्तनम् ।।२३।।**
**श्रद्धया देशकालाप्त-दानं पात्रे दया क्षमा । शौचानसूयानायासाऽतृट्ताकार्पण्यमङ्गले ।।२४।।**
**सत्ता दैवीसम्पदेतल् लक्षणो धर्म उच्यते । श्रैष्ठ्यं कर्माप्यते तस्मात्ततो ज्ञानं ततोऽमृतम् ।।२५।।**

आचारः आद्यः धर्मः। स तु नुः उभयत्र सुखदः। श्रुति+स्मृति+पुराण+उक्त+चरणम्; विष्णु+चिन्तनम्;।२३। श्रद्धया पात्रे देश+काल+आप्त+दानम्; दया+क्षमा+शौच+अनायास+अतृट्ता+अकार्पण्य+मङ्गले।२४। सत्ता, दैवी+संपत् एतत् लक्षणः धर्मः उच्यते। तस्मात् कर्म श्रेष्ठ्यं आप्यते। ततः ज्ञानम्। ततः अमृतम्।'२५।

श्रीगुरू सांगू लागले, आचार सागराप्रमाणे विशाल आहे. ऋषी-मुनींनाही त्याचे ज्ञान होणे दुरापास्त आहे. त्यांतील पराशरादि स्मृतिकारांनी मानलेले सार मी तुला सांगत आहे.२२. 'आचार हा पुरातन धर्म आहे. तोच मानवाला इह आणि परत्र सुखदायक आहे. धर्माची लक्षणे अशी आहेत.(१) श्रुति, स्मृति आणि पुराणांत सांगितल्याप्रमाणे वागणे; (२) श्रद्धापूर्वक, योग्य व्यक्तीला, योग्य देशी, योग्य काळी आपल्या ऐपतीप्रमाणे दान करणे; (३) दया, (४) क्षमा, (५) शौच (पावित्र्य), (६) अधिक सायास न करणे, (७) वितृष्णा (निरिच्छा), (८) कृपणतेचा अभाव, (९) मंगलकारक कर्म करणे, (१०) आस्तिक्य आणि दैवी संपत्ती. दैवी संपत्ती म्हणजे शम, दम, तितिक्षा, समाधान, उपरती आणि मुमुक्षा; किंवा भगवद्गीतेत (१६:२-३) सांगितल्याप्रमाणे अहिंसा सत्य, अक्रोध, त्याग, शान्ती, अपैशुन (परनिंदा न करणे), भूतदया, इंद्रियांवर ताबा, मार्दव, दुराचरणाची लज्जा, चंचलता नसणे, तेज, धैर्य, शौच, अद्रोह आणि निरभिमानता. (*अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्।। तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानता। भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत।।*) या धर्माच्या आचरणानेच कर्माला श्रेष्ठता येते. श्रेष्ठ कर्माचरणानेच आत्मज्ञान लाभते आणि आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो.२३-२५.

**श्रुतिस्मृतिपुराणानि धर्ममूलं श्रुतिर्वरा । तद्वैरे द्वौ वृषौ श्रुत्योर्द्वैधे स्मृत्योस्तु लौकिकः ।।२६।।**
**वर्णाश्रमविभागोक्तो देशकालोचितो वृषः । लौकिकोऽपि चतुर्वर्णैः सेवनीयः प्रयत्नतः ।।२७।।**

श्रुति+स्मृति+पुराणानि धर्म+मूलम्। तत् वैरे श्रुतिः वरा। श्रुत्योः द्वैधे द्वौ वृषौ। स्मृत्योः (द्वैधे) लौकिकः।२६। वर्ण+आश्रम+विभाग+उक्तः देश+काल+उचितः वृषः चतुर्वर्णैः लौकिकः अपि प्रयत्नतः सेवनीयः।२७।

श्रुती (वेद), स्मृती आणि पुराणे हेच धर्माचे मूळ आहेत. ह्यांच्यांत परस्पर विरोध आला तर श्रुतिवचनच श्रेष्ठ ठरते. दोन श्रुतींत विरोध उत्पन्न झाल्यास दोन धर्म होतात. दोन स्मृतींत विरोध असेल तर लौकिक धर्माला अनुकूल अशा स्मृतीने सांगितलेल्या धर्माचा अंगीकार करावा.२६. हा धर्म ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी हे चार आश्रम यांच्यासाठी वेगवेगळा सांगितलेला आहे. तसेच त्यात देश, काल यांचा विचारही केलेला आहे. हा चारी वर्णानी प्रयत्नपूर्वक आचरणांत आणला पाहिजे. 'त्रैलोक्याची रचना करण्याचे सामर्थ्य असलेल्या ब्रह्मदेवाची पदवी प्राप्त झाली तरी लौकिक आचाराचे मनानेसुद्धा उल्लंघन करू नये' असे शास्त्रवचन आहे. महाभारतांत (१८:५:६३) सांगितले आहे की, कसल्याही कामनेसाठी, कुणाच्याही भयाने किंवा कशाच्याही लोभाने, अगदी जीव वांचविण्यासाठीही धर्माचा त्याग करू नये. सुख आणि दुःख हे अनित्य आहेत तर धर्म नित्य आहे. जीव नित्य आहे, त्याच्या उपाधी अनित्य आहेत (*न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः। धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः।।*)२७.

**स्वनुष्ठितादन्यधर्माद् विगुणोपि स्वको वरः । स्वगृह्योक्तोऽविरुद्धोऽपि स्मार्तो ग्राह्यो द्विजातिभिः ।।२८।।**
**नित्यं नैमित्तिकं कर्म नातीयात्काम्यमैच्छिकम् । तत्त्यागी क्वापि न सुखी ब्रह्मीभूतमृते भवेत् ।।२९।।**

सु+अनुष्ठितात् अन्य+धर्मात् विगुणः अपि स्वकः वरः। द्विजातिभिः स्वगृह्य+उक्तः अविरुद्धः स्मार्तः अपि ग्राह्यः।२८। नित्यं नैमित्तिकं कर्म न अतीयात्। काम्यं ऐच्छिकम्। तत्+त्यागी ब्रह्मीभूतं ऋते क्व अपि न सुखी भवेत्।२९।

भगवद्गीतेच्या प्रतिपादनानुसार (३:३५) उत्तम प्रकारे आचरलेल्या परधर्मापेक्षा यथातथा आचरलेला आपला विहित धर्म श्रेष्ठ आहे. स्वधर्मांत मृत्यूही आला तरी कल्याणप्रद आहे; परधर्म भयावह आहे आहे (*श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।।*).

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या त्रैवर्णिकांनी आपापल्या शाखेचा गृह्योक्त धर्म आचरावा. त्याच्याशी विरोध नसलेला स्मार्त धर्महीं सर्वांना ग्राह्य आहे. *'सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात्'* ब्रह्मसूत्रानुसार (३:३:१) शाखाभेद जरी असला तरी विधींत भेद नसल्याने उपासनेत फरक पडत नाही.२८. संध्योपासना, होम, पंचमहायज्ञ, दर्शादि कर्मे नित्य होत; जातकर्मादि कर्मे नैमित्तिक होत. ही न केल्यास प्रत्यवाय दोष लागतो. यासाठी ती कधीही चुकवू नयेत. काम्यकर्म न केल्याचा कांही दोष शास्त्रांत सांगितलेला नाही. शिवाय ती केल्याने बंधक होऊ शकतात. (*अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते* भ.गीता ५:१२) 'तर मग काम्य कर्मे करूच नयेत असे का सांगीतले नाही?' असे विचाराल तर त्याचे नियमन आसक्त आणि अनासक्त यांच्यासाठी वेगवेगळे केले आहे. तैत्तिरीय उपनिषदांत '*आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः*' (१:११:१) असे वचन आहे. त्यावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे. 'आचार्यांची अनुज्ञा घेऊन अनुरूप पत्नीचे पाणिग्रहण करून प्रजातंतूचा विच्छेद करू नये. पुत्र झाला नाही तर तो व्हावा म्हणून काम्यादि कर्मांचे अनुष्ठान करावे. हे विवेचन आसक्त लोकांसाठी आहे. *लोकोऽपुत्रस्य नास्ति* ह्या

**प्रमादलुप्तकर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिर्विना । अनुतप्तं प्रयत्नाद्धी-दुःसङ्गापहृतक्रिया ।।३०।।**

प्रमाद+लुप्त+कर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिः। दुःसङ्ग+अपहत+क्रिया हि प्रयत्नात्। विना अनुतप्तम्।३०।

श्रुतीचे मर्म जाणणाऱ्या विरागी लोकांसाठी मात्र बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) वित्तैषणा, लोकैषणा आणि दारैषणा ह्या तिन्हींचा त्याग सांगितला आहे. अशा लोकांना जर तीव्रतर मुमुक्षा असेल तर त्यांनी संन्यास ग्रहण करणेच श्रेयस्कर आहे. इतर आरुरुक्षूंना नित्यनैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान विहित आहे. पण जे मोक्षाला विमुखच आहेत त्यांच्यासाठी काम्यकर्माचे प्रतिपादन केले आहे.

नित्य-नैमित्तिक कर्म सोडणाऱ्याला ना इथे - इहलोकांत, सुख आहे ना परलोकी. याला अपवाद फक्त आत्मसाक्षात्कारी पुरुषाचा आहे. *यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तिश्च मानवः। आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।। नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः।।* भ.गीता ३:१७-१८।। जो आत्मसुखांतच रमलेला आहे, आत्म्यातच तृप्त आहे आणि आत्म्यानेच संतुष्ट आहे त्याला कांहीही कर्म करण्याची आवश्यकता नाही. त्याला न कर्म करण्याचे कांही प्रयोजन असते न कर्म न करण्याचे! त्याला कुणाही जीवापासून कांहीच स्वार्थ साधायचा नसतो.२९.

ज्याचे कर्म अनवधानाने लुप्त झाले आहे त्याची शांडिल्य श्रौतसूत्रानुसार (३:१९:१) प्रायश्चित्ताने शुद्धी होते. वाईट संगतीला लागून, बुद्धिपूर्वक ज्याने आपले कर्म सोडले असेल त्याला शुद्धीसाठी प्रयत्नांची आवश्यकता आहे. याला अपवाद पश्चात्तापाचा आहे. पश्चात्तापाने लगेच शुद्धी होते. पण पश्चात्ताप झाला पाहिजे. तो ईश्वर, गुरू किंवा संत यांच्या कृपेविना होत नाही.३०.

**भजेत्सलक्षणं धर्मं श्रद्धाभक्तियुतो नरः । ब्राह्मणस्तु विशेषेण यतोऽस्मै श्रैष्ठ्यमर्पितम् ।।३१।।**
**दानादाने याजनेज्येऽध्ययनाध्यापने द्विजः । स्नानसन्ध्याजाप्यहोम-पाठयज्ञपरश्चरेत् ।।३२।।**
**वैदिकां तान्त्रिकां मिश्रामाद्यां वैकां चरेत्क्रियाम् । विमलः सुमुखस्नातो द्विराचान्तो गुरूक्तिमान् ।।३३।।**
**त्रिकच्छी धौतसच्छुष्क-द्विवासा यतगोशिखः । मृद्भस्मगन्धान्यतम-लिप्तो दर्भकरः शुचिः ।।३४।।**

श्रद्धा+भक्ति+युतः नरः सलक्षणं धर्मं भजेत्। विशेषतः ब्राह्मणः यतः अस्मै श्रैष्ठ्यं अर्पितम्।३१। स्नान+सन्ध्या+जाप्य+होम+पाठ+यज्ञ+परः द्विजः दान+आदाने, याजन+इज्ये, अध्ययन+अध्यापने चरेत्।३२। वैदिकां तान्त्रिकां मिश्रां वा एकां आद्यां क्रियां चरेत्। विमलः, सुमुखः, स्नातः, द्विः+आचान्तः, गुरु+उक्ति+मान्,।३३। त्रिकच्छी, धौत+सत्+शुष्क+द्विवासा, यत+गो+शिखः, मृत्+भस्म+गन्ध+अन्यतम+लिप्तः, दर्भकरः, शुचिः।३४।

प्रत्येक माणसाने आपल्या धर्माचे यथासांग आचरण करायला हवे. विशेषतः ब्राह्मणांनी; कारण सर्व वर्णांत त्यांना मोठेपणा दिलेला आहे.३१. स्नान, संध्या, जप, होम, वेदपठण, यज्ञ ह्या कर्मांबरोबरच ब्राह्मणाने दान, परिग्रह, यजन, याजन, अध्ययन आणि अध्यापन ही सहा कर्मे करावीत. त्यांतील परिग्रह, याजन आणि अध्यापन ही उपजीविकेसाठी आहेत; तर इतर अधिक पुण्यसंचयासाठी आहेत.३२. वैदिक आणि तांत्रिक अशा मिश्र विधीने किंवा केवळ वैदिक विधीने गुरूंनी सांगितल्याप्रमाणे कर्म करावे. प्रथम शौचविधि करून मुखमार्जन आणि स्नान करावे. त्यानतंर दोन वेळा आचमन करून(३३) ब्रह्मचाऱ्याने तीन काष्ठे असलेले तर गृहस्थाने पांच काष्ठ्यांचे वस्त्र नेसावे. धुवून चांगली वाळविलेली दोन वस्त्रे धारण करावीत. एक कमरेला आणि एक अंगावर. मग शेंडी बांधून मौन धरावे. गोपीचंदन, भस्म किंवा चंदन धारण करावे. हातांत दर्भ घ्यावेत. पावित्र्याने (सोवळ्याने) कर्म करावे.३४.

**पीठस्थोऽन्तर्जानुकरः प्रकुर्यात्कर्म सत्स्थले । उपोषितो विना नैशं कुर्याद्यज्ञजपार्चनम् ।।३५।।**
**दोषो नौषधगव्येक्ष्वप् फलताम्बूलभक्षणे । कर्म संकल्प्य कार्यं सम्पूर्णतास्येश्वरार्पणात्।।३६।।**
**(क्षेपकः) खेऽर्को यत्रैत्युद्गमास्तौ प्राक्प्रत्यक् ते ततोऽपराः ।।**

सत्+स्थले पीठस्थः अन्तः+जानु+करः कर्म प्रकुर्यात्। यज्ञ+जप+अर्चनं, विना नैशं उपोषितः कुर्यात्।३५। औषध+गव्य+इक्षु+अप्+फल+ताम्बूल+भक्षणे न दोषः। कर्म संकल्प्य कार्यम्। ईश्वर+अर्पणात् अस्य सम्पूर्णता।३६। खे यत्र अर्कः अद्गम+अस्तौ ते प्राक्+प्रत्यक्। ततः अपराः।

पवित्र ठिकाणी आसनावर बसून कर्म करावे; हात गुडघ्याच्या आत असावेत. यज्ञ, जप, पूजा हे उपाशीपोटी करावेत. रात्रीच्या कर्माला हा नियम नाही. औषध, दूध, ऊस (रस), पाणी, फळ, तांबूल ही कर्माच्या आधी घेतली तर दोष नाही. कर्म करताना आधी संकल्प करावा. *यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपः पूजाक्रियादिषु न्यूनं सम्पूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम।।* या नारदपुराणाच्या वचनानुसार (पूर्वपाद १ः१७ः१०८) आणि *प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषु यत् । स्मरणादेव तद्विष्णोः सम्पूर्णं स्यादिति श्रुतिः।।* या स्मृतीनुसार कर्माची संपूर्णता ते ईश्वराला अर्पण केल्यानेच होते.३५-३६.

आकांशात सूर्य जिथे उगवतो ती पूर्व दिशा आणि जिथे मावळतो ती पश्चिम दिशा. त्यापासून इतर दिशा काढता येतात. ज्या प्रदेशात पूर्व काढायची असेल तिथे एक वर्तुळ काढावे. त्याच्या मध्यभागी बारा अंगुळांचा एक शंकू ठेवावा. दिवसाच्या पूर्वार्धात शंकूची सावली जिकडे पडेल त्या सावलीच्या टोकावर खूण करावी. ही पश्चिम दिशा होय. दुपारच्यानंतर शंकूची सावली जिथून वर्तुळाच्या बाहेर पडेल ती पूर्व दिशा. आता ह्या दोन्हीच्या मधोमध जो व्यास आहे त्याच्या टोकांना दक्षिण आणि उत्तर दिशा. चार दिशांच्या मध्यबिंदूवरून विदिशा (आग्नेयादि) काढता येतात. हे दिक्साधन ज्या दिवशी सायनांश सूर्य मेष राशीला येतो त्या दिवशी करावे. इतर दिवशी सूर्यक्रांतीनुसार दिशासाधनेचे वेगळे गणित करावे लागेल.

**द्युनक्तं प्रागुदग्वक्त्रो होमाद्येऽग्न्यादिसंमुखः । सौम्यैन्द्र्यैशान्यनुक्तायां दक्षाङ्गं चोपवीतता ।।३७।।**

द्यु+नक्तं प्राक्+उदक्+वक्त्रः। होमाद्ये अग्नि+संमुखः। अनुक्तायां सौम्य+ऐन्द्र+ऐशानि दक्षाङ्गं च उपवीतता।३७।

अशा रीतीने सूर्योदयावरून दिशा निश्चित होतात. सूर्योदय याचा अर्थ सूर्य त्या त्या लोकांतील जीवांना दृग्गोचर होतो तो आणि अस्त म्हणजे सूर्य दृष्टिआड होणे. ज्या लोकात कुणी प्राणीच निवास करीत नाहीत तिथे सूर्य त्या मार्गाने जाऊनही त्याचा उदय होत नाही आणि अस्तही होत नाही. मग अमरकोशांत सांगितल्याप्रमाणे एका महिन्यांत पितरांचे एक अहोरात्र होते, वर्षांत देवांचे अहोरात्र, देवांच्या हजार युगांचे ब्रह्मदेवाचे दोन अहोरात्र इत्यादि कालगणनेचा कसा संदर्भ लावायचा? जसा या भारतवर्षांत साठ घटकांचा (चोवीस तासांचा) अहोरात्र आहे, त्या मानवी मापाने एक महिन्यांत पितरांचा अहोरात्र होतो. अर्थात मानवी शुक्लपक्षात पितृलोकांत सतत सूर्यदर्शन होते आणि कृष्णपक्षात रात्र असते. त्याच प्रकारे स्वर्गातील देवांचा अहोरात्र मानवी वर्षाएवढा असतो. तिथे मानवी उत्तरायणात सतत सूर्य दिसतो व दक्षिणायनात त्याचा अस्त असतो. जेव्हा अमरावतीला सूर्य माध्याह्नाला येतो तेव्हा दक्षिणेला असलेल्या संयमिनीत (यमपुरी) तो उत्तरेकडे उगवताना दिसतो. जेव्हा संयमिनीत सूर्य माथ्यावर येतो तेव्हा वारुणीत तो उगवताना दिसतो. इलावृत चारी बाजूंनी पर्वतांनी वेढलेले असल्याने तिथे सूर्याचा प्रकाश पर्वतावरील छिद्रांतून प्रवेश करीत असल्याने ऊर्ध्व दिशेला उगवतो आणि खाली मावळतो. छांदोग्यात सांगितल्याप्रमाणे (३:११:२) ब्रह्मलोकात सूर्य सततच प्रकाशत असल्याने उदयास्त नाहीत.

दिवसा पूर्वाभिमुख आणि रात्री उत्तराभिमुख बसून कर्म करावे. होमासाठी अग्नीसंमुख (आश्वलायन गृह्यसूत्र १:१०:१५-१६) आणि पूजेसाठी देवसंमुख बसावे. ज्या कर्मात दिशा सांगितली नसेल तिथे पूर्व, उत्तर किंवा ईशान्येकडे मुख करावे. स्थलाचा निर्देश नसेल तर उजव्या अंगाने बसावे. जानवे उपवीतीला (डाव्या खांद्यावर) असावे.३७.

**आसीनत्वं मध्यपाठो देवतीर्थमनुक्तके । निवीतं कण्ठलम्ब्यार्षं दक्षांसस्थं तु पित्र्यकम् ।।३८।।**
**प्राचीनावीतमन्यांसस्थं सूत्रं तूपवीतकम् । भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा दद्ध्यान्नवं विधेः ।।३९।।**
**त्रिघ्नीकृत्य त्रिपद्या षण्नवतिस्वकरोन्मितम् । तूलादिसूत्रं पुनस्त्रिरावृत्य नवसूत्रकम् ।।४०।।**
**कृत्वा त्रिरावृतं ग्रन्थिं दत्वा काजशिवान्नमन् । प्रोक्ष्याब्लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या धेहि मन्त्रवत् ।।४१।।**

अनुक्तके आसीनत्वं, मध्यपाठः, देवतीर्थं। कंठलंबी+आर्षं निवीतं ऋषि+कर्मणि। पित्र्यकं तु दक्ष+अंसस्थम्।३८। अन्य+अंसस्थं तु उपवीतकम्। भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा विधेः नवं दध्यात्।३९। षण्+नवति+स्वकर+उन्मितं तूलादि+सूत्रं त्रिपद्या त्रिघ्नी+कृत्य पुनः त्रिः आवृत्य नव+सूत्रकं कृत्वा त्रिः+आवृतं क+अज+शिवान् नमन् ग्रन्थिं दत्वा अप्+लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या प्रोक्ष्य मन्त्रवत् धेहि।४०-४१।

स्थिति सांगितली नसेल तर बसून कर्म करावे. पाठ सांगितला नसेल तर मध्यमपाठ असावा. तीर्थ सांगितले नसेल तर देवतीर्थ घ्यावे. जानवे गळ्यात सरळ घातले तर ती निवीती होते; ती ऋषिकर्मांत विहित आहे. पितृकर्मांत जानवे उजव्या खांद्यावर (प्राचीनावीती) असावे.३८. जानवे डाव्या खांद्यावर असल्यास त्याला उपवीती म्हणतात. तसे देवकार्यांत ठेवावे. अस्पृश्य, अंत्यज किंवा अस्पृश्य स्त्री यांना शिवल्यास जानवे भ्रष्ट होते; तसे झाल्यास किंवा तुटल्यास ते जानवे टाकून विधिपूर्वक नवीन धारण करावे.३९. आपल्या हाताने शहाण्णव हात सूत किंवा रेशीमादीचा दोरा त्रिपदी गायत्रीने तिहेरी करावा. तो पुनः तिहेरी करून झालेले नवपदरी सूत्र पुनः तिहेरी करून ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांना नमस्कार करीत त्याला गाठ बांधावी. त्या जानव्याचे *'आपोहिष्ठा'*दि तीन ऋचांनी आणि दहा गायत्रींनी प्रोक्षण करावे. मग *'यज्ञोपवीतं'* इत्यादि मंत्राने ते धारण करावे.४०-४१.

**शश्वद्योज्याः सत्स्थिताग्नि-मन्त्रदर्भासनद्विजाः । पिण्डादिस्थाः कुशा विप्रः प्रेतश्राद्धाच्चितानलः ।।४२।।**

**मन्त्रा गौस्तुलसी नीचेऽसन्तः सन् शोधितो द्विजः । सोङ्कारान् सर्वदा होमे स्वाहान्तान्वामहस्तहृत् ।।४३।।**

**आर्षच्छन्दोदेवताविनियोगज्ञो मनून्जपेत् । शूद्राहृतं द्विजक्रीतं समिद्दर्भाप्सुमाद्यसत् ।।४४।।**

सत्+स्थित अग्नि+मंत्र+दर्भ+आसन+द्विजाः शश्वत् योज्याः। पिण्डादिस्थाः कुशाः, प्रेत+श्राद्धात् विप्रः, चिता+अनलः, नीचे, मन्त्राः, गौः, तुलसी असन्तः। द्विजः शोधितः सन्तः। सर्वदा स+ॐकारान्, होमे वाम+हस्त+हृत् स्वाहा+अन्तान्।४२-४३। मनून् आर्ष+छंदः+ देवता+विनोग+ज्ञः जपेत्। शूद्र+आहृतं द्विज+क्रीतं समित्+दर्भ+अप्+सुम+आदि असत्।४४।

शुभकार्यांत वापरलेले सुस्थितीतील अग्नी, मंत्र, दर्भ, आसन आणि ब्राह्मण यांचा वारंवार उपयोग करावा. पिण्डावर वगैरे टाकलेले दर्भ, एकोद्दिष्ट श्राद्ध जेवलेला ब्राह्मण,(४२) चितेचा अग्नी, नीचाकडचा मंत्र, गाय आणि तुळस हे सर्व अशुभ आहेत. ब्राह्मण संस्कार, प्रायश्चित्त इत्यादींनी शुद्ध होतो. जप, होम इत्यादि सर्व कार्यात मंत्राच्या पूर्वी ॐकार लावून उच्चार करावा. होमाच्या वेळी मंत्राच्या शेवटी स्वाहा लावावे आणि डावा हात हृदयावर धरलेला असावा.४३. *'अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च। योऽध्यापयेद्यजेद्वाऽपि पापीयान्जायते तु सः'* या स्मृतीनुसार (बृहद्देवता ८ः१३६) मंत्रांचा जप करतांना ऋषी, छंद, देवता आणि विनियोग यांचे ज्ञान आवश्यक आहे. समिधा, दर्भ, पाणी, फुले इत्यादी ब्राह्मणांनी स्वतः आणावीत असे धर्मसिंधूंत वचन आहे. ती शूद्राने आणलेली किंवा ब्राह्मणाने विकलेली असतील तर अशुद्ध आहेत.४४.

**अफेनानुच्छिष्टहस्त-नखास्पृष्टामलाम्बु सत् । कुशकाशयवोशीर-गोधूमव्रीहिकुन्दराः ॥४५॥**

**दूर्वामौञ्जस्तृणं दर्भा वर्षामास्वीकृताः शुभाः । मूलतो ब्रह्मविष्णवीशा दर्भे सर्वेऽभितोऽमराः ॥४६॥**

**कर्मोत्तरान्तं प्राक्संस्थं व्यस्तं वा पित्र्यमग्निगम् । याम्यन्तं तद्वदास्यं च ज्ञेयोऽङ्गे वामतः क्रमः ॥४७॥**

अफेन+अनुच्छिष्ट+हस्त+नख+अस्पृष्ट+अमल+अम्बु सत्। कुश+काशय+वोशीर+गोधूम+व्रीहि+कुन्दराः दूर्वा+मौञ्जः+तृणं दर्भाः वर्षा+अमा+स्वीकृताः शुभाः। दर्भे मूलतः ब्रह्म+विष्णु+ईशाः अभिते सर्वे अमराः।४५-४६। कर्म उत्तरान्तं प्राक्+संस्थं व्यस्तं वा। पित्र्यं अग्नि+गं याम्यन्तं तत्+वत् आस्यं च। अङ्गे वामतः क्रमः।४७।

पाणी फेसरहित, उष्टे नसलेले, हात किंवा नख न लागलेले आणि स्वच्छ, कर्मासाठी श्रेष्ठ जाणावे. कुश, कास, जव, वाळा,गहू, साळी, कुन्दा, दूर्वा, मुंज आणि गवत हे दहा दर्भ आहेत. ते श्रावणातील अमावास्येला घतलेले शुभ होत. *'अयातयामास्ते दर्भाः विनियोज्याः पुनः पुनः'* या धर्मसिंधूच्या वचनानुसार ते वर्षभर वापरता येतात. दर्भाच्या मुळाशी ब्रह्मा, मध्ये विष्णू, अग्राला शंकर आणि सभोवती सर्व देवता वास करतात.४५-४६. देवकर्म करताना ते पूर्वेकडे स्थापून उत्तरेला संपवावे किंवा उत्तरेकडे स्थापून पूर्वेला संपवावे आणि पितरांचे कर्म आग्नेयेला आरंभ करून दक्षिणेला संपवावे. देवकर्म करतांना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख असावे आणि पितृकर्माचे वेळी दक्षिणेकडे मुख करावे. अंगाविषयी डावीकडून क्रम असावा. ४७.

**तर्जन्यल्पाधःकराग्र-मध्यादिषु यथाक्रमम् । तीर्थं पित्र्यं कायदैवमाग्नेयं ब्राह्ममुच्यते ।।४८।।**
**पित्रर्षिदेवादानोप-स्पर्शकार्यं चरेत्तु तैः । वामान्वारब्धान्यपाणिः कर्माद्यान्ताम्बुदानयुक् ।।४९।।**
**त्वक्फलकृमिरोमोत्थ-श्वेतासृक्पीतमेचकम् । वासो दग्धं द्विजादेः सद्धौतमस्फाटितं स्वकम् ।।५०।।**
**ब्राह्मे मुहूर्त उत्थाय गणेशब्रह्मविष्णवजान् । देवान्नत्वा गुरून्खेटान्गां सच्छ्लोकांश्च संस्मरेत् ।।५१।।**

तर्जनी+अल्प+अधः+कर+अग्र+मध्य+आदिषु यथाक्रमं पित्र्यं कायं आग्नेयं ब्राह्मं तीर्थं उच्यते।४८। पितृ+ऋषि+देव+आदान+ उपस्पर्श+कार्यं तैः चरेत्। वामान् वा आरब्ध अन्य पाणिः। कर्म आदि+अंत अम्बु+दान+युक्।४९। त्वक्+फल+कृमि+रोम+उत्थ श्वेत+असृक्+पीत+मेचकं वासः द्विज+आदेः । धौतं अदग्धम् अस्फाटितं स्वकम् सत् ।५०। ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय गणेश+ब्रह्म+विष्णु+अजान् देवान् गुरून् खेटान् गां च नत्वा सत्+श्लोकान् च संस्मरेत्।५१।

उजव्या हाताच्या तर्जनीखाली पितृतीर्थ, करंगळीखाली ऋषितीर्थ, हाताच्या अग्रभागी दैवतीर्थ, मध्यभागी आग्नेय तीर्थ आणि करमूलाजवळ ब्राह्मतीर्थ अशी तीर्थे आहेत. त्यांची योजना अनुक्रमे पितृकर्म, ऋषिकर्म, देवकर्म, प्रतिग्रह (दान घेणे) आणि आचमन यासाठी करावी. कर्माच्या आरंभी डाव्या हाताने उजव्या हाताला स्पर्श करावा. कर्माच्या आरंभी आणि शेवटी पाणी द्यावे.४८-४९. झाडाच्या सालीपासून केलेले पांढरे, कापसाचे लाल, रेशमाचे पिवळे व लोकरीचे निळे (काळे) ही वस्त्रे अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना शुभ आहेत. वस्त्र स्वच्छ धुतलेले, न जळलेले, न फाटलेले आणि आपले स्वतःचे शुभ जाणावे. इथे आचारधर्माची परिभाषा पूर्ण झाली.५०.

ब्राह्म मुहूर्त म्हणजे चिंतनाला योग्य असा रात्रीचा चौथा प्रहर. त्या वेळीं उठून गणेश, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आदि देवांना, तसेच माता, पिता, गुरू इत्यादि वडीलधाऱ्यांना, सूर्यादि ग्रहांना, भूमीला आणि गोमातेला नमस्कार करून धर्मादि पुण्यश्लोकांचे स्मरण करावे.५१.

**ग्रामाद्बहिस्तु नैर्ऋत्यां सद्द्रम्ब्वध्वादि वर्जिते । स्थलेम्बु दूरात्संस्थाप्य यतनासाक्षिवाक् तृणे ।।५२।।**
**उदङ्मुखोऽन्यथा नक्तमासीनो वस्त्रमस्तकः । आर्षसूत्रं दक्षकर्णे कृत्वा मूत्रविशौ त्यजेत् ।।५३।।**
**लिङ्गं सहाद्भिरप्स्थार्द्र-धात्रीमात्रमृदा गुदम् । त्रिर्वामो दशवारं च करः शोध्याः कराङ्घ्रयः ।।५४।।**
**प्रत्येकं सप्तवारं द्वि-गुणं वीर्येऽर्धमन्यके । वर्णिवानप्रस्थभिक्षोः शौचं द्वित्रिचतुर्गुणम् ।।५५।।**

ग्रामात् बहिः नैर्ऋत्यां सत्+द्रु+अम्बु+अध्व+आदि वर्जिते स्थले, अम्बु दूरात् संस्थाप्य यत+नासा+अक्षि+वाक् उदक्+मुखः नक्तं अन्यथा वस्त्र+मस्तकः आर्षसूत्रं दक्ष+कर्णे कृत्वा मूत्र+विशौ त्यजेत्।५२-५३। अप्+स्थ+आर्द्र+धात्री+मात्र मृदा अद्भिः सह लिङ्गं, गुदं त्रिः, वामः करः दशवारं च शोध्याः। कर+अङ्घ्रयः प्रत्येकं सप्तवारम्। वीर्ये द्विगुणम्। अन्यके अर्धम्। वर्णि+वानप्रस्थ+भिक्षोः द्वि+त्रि+चतुः+गुणं शौचम्।५४-५५।

नंतर गावाच्या बाहेर नैर्ऋत्य दिशेला जाऊन वड, पिंपळ आदि पुण्यवृक्षांपासून, (नदी, तलाव इत्यादि) जलापासून तसेच वाटेपासून दूर जागेवर पाणी दूर ठेवावे; डोक्यावरून नाकावर वस्त्र घेऊन, दृष्टी स्थिर करून, इकडे-तिकडे न पाहता मौन धारण करावे; गवत पसरावे; उत्तरेकडे (रात्री दक्षिणेकडे) तोंड करून, वस्त्र डोईला गुंडाळून, जानवे उजव्या कानाला अडकवून मलमूत्रविसर्जन करावे.५२-५३.

ओल्या आवळ्याएवढ्या ओल्या मातीच्या गोळ्यांनी आणि पाण्याने एक वेळा लिंग, तीन वेळा गुद, दहा वेळा डावा हात, उजवा हात आणि दोन्ही पाय प्रत्येकी सात वेळा स्वच्छ करावेत. वीर्यपातानंतर हेच शौच दुप्पट करावे; मूत्रोत्सर्गानंतर निम्मे करावे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी यांना शौचाचे प्रमाण दुप्पट, तिप्पट आणि चौपट सांगितले आहे.५४-५५.

**अर्धार्धार्धं निशाशक्ति-मार्गेष्वज्ञाबलासु तु । गन्धलेपान्तावधि स्याद् गण्डूषान्वामतस्त्यजेत् ।।५६।।**
**द्विजो द्वादश चान्योऽल्पान्तर्जन्यास्यं न शोधयेत् । क्षीरिकण्टकिवृक्षाम्र-निम्बापामार्गदारुणा ।।५७।।**
**द्वादशाङ्गुलमात्रेण द्विजोऽन्योऽल्पेन मन्त्रवत्। शुद्धास्योऽब्गोविशा प्रातः स्नायान्मध्यन्दिनेऽम्मृदा ।।५८।।**
**भिक्षुर्व्रती त्रिकालं न चिरण्टी शिरसा सदा । शीतैः शीताप्सम्पुटितोष्णकैर्वाब्लिङ्गमन्त्रितैः ।।५९।।**

अर्ध+अर्ध+अर्धं निशा+अशक्ति+मार्गेषु। अज्ञ+अबलासु गन्ध+लेप+अन्त+अवधि स्यात्। द्विजो गण्डूषान् वामतः त्यजेत्, अन्यो अल्पान्। तर्जन्या आस्यं न शोधयेत्। क्षीरि+कण्टकिवृक्ष+आम्र+निम्ब+अपामार्ग+दारुणा द्वादश+अंगुल+मात्रेण द्विजः अन्यः अल्पेन मन्त्रवत् शुद्ध+आस्यः प्रातः अप्+गो+विशा स्नायान्। मध्यन्दिने मृदा।५६-५८। भिक्षुः व्रती त्रिकालं (स्नायात्)। चिरण्टी सदा शिरसा न स्नायात्। शीतैः शीत+अप्+सम्पुष्टित+उष्ण+कैः वा अप्+लिङ्ग+मन्त्रितैः (स्नायात्)।५९।

रात्रीच्या वेळी शौच अर्धे करावे, अशक्तांनी त्याच्या अर्धे आणि प्रवासात त्याच्याही अर्धे करावे. लहान मुले आणि स्त्रिया यांच्यासाठी शौचाची मात्रा केवळ गंध आणि लेप जाईपर्यंतच सांगितली आहे. चुळा डावीकडे टाकाव्यात. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी दहा, वैश्यांनी आठ तर शूद्रांनी चार चुळा भराव्यात. तर्जनीने दात घासू नयेत. पिंपळ, बाभळ, आंबा, निम्ब, आघाडा यांच्या काडीने दात घासावे. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी आठ आणि वैश्यांनी आठ अंगुलीच्या सालीसह ओल्या काष्ठाने '*मुखदुर्गन्धि*' या मंत्राने दात घासून जीभ रगडून इत्यादि प्रकारे तोंड धुवावे. नंतर प्रातःस्नान गोमय आणि पाण्याने करावे. मध्याह्न काळी मृत्तिकास्नान करावे.५६-५८.

कुटीचक आणि बहूदक संन्याशांनी, वानप्रस्थांनी तसेच चांद्रायणादि व्रत करणाऱ्यानी त्रिकाल स्नान करावे. हंस संन्याशांना एकच वेळ स्नान विहित आहे. सुवासिनींनी नेहमी डोक्यावरून स्नान करू नये. थंड पाण्याने किंवा '*आपोहिष्ठा*' इत्यादि मंत्रांनी मंतरलेल्या संपुष्टित गरम पाण्याने स्नान करावे. संपुष्टित म्हणजे आधी थोडे थंड पाणी घालून त्यानंतर कढत पाणी आणि पुनः वरून थंड पाणी मिसळणे.५९.

**धाम्न्याचमनसङ्कल्प-मार्ष्टितृप्त्यघहारि नो । दीपाल्युत्सवमाङ्गल्याऽब्दाद्येऽभ्यङ्गं सदैच्छिकम् ।।६०।।**
**अनिन्द्याहेऽधवाभिक्ष्वोर्नेदं स्नायान्न शीतकैः । माङ्गल्येऽर्भोत्पत्तिपर्व-क्रान्तिश्राद्धेषु नोष्णकैः ।।६१।।**
**स्नायाद्वान्त्यशुचिस्पर्श-दुःस्वप्नरतिदुर्गमे । नद्यां प्रवाहाभिमुखो वरुणं प्रार्थ्य मन्त्रवत् ।।६२।।**
**स्नात्वा लोड्याम्ब्वम्बुमन्त्रैः स्वमुन्माार्ज्याघमर्षणम् । कृत्वा स्नात्वा तर्पयित्वा जले देवानृषीन्पितॄन् ।।६३।।**
**निष्पीड्योदग्दशं वासः शोधिताङ्गो गृहं व्रजेत् । स्रवत्यात्मा सरन्ध्रोऽतः प्रातःस्नानं विशोधनम् ।।६४।।**

धाम्नि आचमन+आचमन+सङ्कल्प+मार्ष्टि+तृप्ति+अघहारि नो। दीपालि+उत्सवे+माङ्गल्ये+अब्दाद्ये अभ्यङ्गं (कार्यम्)। सदा अनिन्द्य+अहे ऐच्छिकम्। अधवा+भिक्षोः इदं न। माङ्गल्ये शीत+कैः न स्नायात्। अर्भ+उत्पत्ति+पर्व+क्रान्ति+श्राद्धेषु उष्ण+कैः न।६०-६१। वान्ति+अशुचि+स्पर्श+दुःस्वप्न+रति+दुर्गमे स्नायात्। नद्यां प्रवाह+अभिमुखः मन्त्रवत् वरुणं प्रार्थ्य स्नात्वा अम्बु आलोड्य अम्बु+मन्त्रैः स्वं उन्मार्ज्य, अघमर्षणं कृत्वा, जले स्नात्वा देवान् ऋषीन् पितन् तर्पयित्वा, वासः उदक्+दशं निष्पीड्य, शोधित+अङ्गः गृहं व्रजेत्। सरन्ध्रः आत्मा स्रवति। अतः प्रातः+स्नानं वि+शोधनम्।६२-६४।

घरी स्नान करताना आचमन, संकल्प, मार्जन, तर्पण आणि अघमर्षण करू नये. दिवाळीच्या सणांत, विवाहादि मंगलकार्याच्या दिवशी, पाडव्याला अभ्यंग स्नान करावे. इतर दिवशी, षष्ठी, अष्टमी आणि चतुर्दशी सोडून ते ऐच्छिक आहे. विधवा आणि संन्यासी यांना अभ्यंगस्नान वर्ज्य आहे. मंगलकार्यादिवशी थंड पाण्याने स्नान करू नये. पुत्रजन्म, पर्वकाल, संक्रान्ती आणि श्राद्ध या दिवशी गरम पाण्याने स्नान करू नये.६०-६१. उलटी झाल्यावर, अपवित्र व्यक्तीचा स्पर्श झाल्यावर, दुःस्वप्नानंतर, मैथुनोत्तर, स्मशानादि स्थानी गेल्यावर स्नान करावे. नदीत स्नान करताना प्रवाहाकडे तोंड करून वरुणाची प्रार्थना करून *'हिरण्यशृंग'* इत्यादि मंत्रांनी स्नान करावे. पाणी लोटून *'आपोहिष्ठा'*दि मंत्रांनी स्वतःवर मार्जन करावे. मग अघमर्षण करून स्नान करावे आणि पाण्यातच देव, ऋषी आणि पितर यांचे तर्पण करावे. मग वस्त्राच्या दशा उत्तरेकडे करून ते पिळावे. त्या वस्त्राने अंग कोरडे करून घरी यावे. हा देह नऊ रंध्रांतून स्रवत असतो. त्यासाठी प्रातःस्नान हे विशेष शोधन आहे.६२-६४.

**त्रिसप्तद्वादशाहं चेत् सन्ध्यास्नानाग्निवर्जितः । द्विजोऽपि शूद्रोऽशक्तश्चेन् मान्त्राद्यन्यतमं चरेत् ।।६५।।**
**हृद्यभौमाग्नेयमान्त्रानिलदिव्यैः शुचिर्हरेः । ध्यानमृद्भस्माम्मनुगो-रजोवर्षात्मकाप्लवैः ।।६६।।**
**मेधाऽलोलुपतारोग्य-रूपतेजोयशोबलम् । शौर्यदुःस्वप्नहृत्यायुर्लभेत्स्नातोऽन्यथापरम् ।।६७।।**
**स्नात्वा मृद्भस्म हुत्वाङ्गे धार्यमभ्यर्च्य चन्दनम् । केशवाद्यैर्द्वादशभिः सिते पक्षेऽसिते परैः ।।६८।।**

त्रि+सप्त+द्वादश+अहं सन्ध्या+स्नान+अग्नि+वर्जितः चेत् द्विजः अपि शूद्रः (भवेत्)। अशक्तः चेत् मान्त्रादि अन्यतमं चरेत्।६५। हृद्य+भौम+आग्नेय+मान्त्र+अनिल+दिव्यैः हरेः ध्यानं+मृत्+भस्म+ अप्+मनु+गोरजः+वर्षात्मक +आप्लवैः शुचिः।६६। स्नातः मेधा, अलोलुपता, आरोग्य, रूप, तेजः, यशः, बलं, शौर्य, दुःस्वप्न+हृति, आयुः लभेत्। अन्यथा अपरम्।६७। स्नात्वा मृत्, हुत्वा भस्म, अभ्यर्च्य चन्दनं अङ्गे धार्यम्। सिते पक्षे केशवाद्यैः द्वादशभिः, असिते परैः।६८।

तीन दिवस संध्या, सात दिवस स्नान आणि बारा दिवस आधान अग्नी टाकल्यास ब्राह्मणसुद्धा शूद्र होतो. स्नान करण्याची शक्ती नसेल तर मंत्रस्नानादि एखादा पर्याय अवलंबावा.६५. हे पर्याय असे - हरीच्या ध्यानाने **मानसिक**, द्वारावती वा अन्य मृत्तिकेच्या लेपाने **पार्थिव** स्नान, भस्मलेपनाने **आग्नेय** स्नान, '*आपोहिष्ठा*'दि मंत्रांनी मंत्रस्नान, गोधूलीयुक्त वारा अंगावर घेतल्याने वायुस्नान आणि ऊन्हात पडणाऱ्या पावसात भिजणे हे **दिव्य** स्नान, यांनी शुद्धता येते.६६. स्नान केल्याने, बुद्धीची धारणाशक्ती, अलोलुपता, आरोग्य, सुरूपता, कांती, कीर्ती, बळ, दुःस्वप्ननाश आणि दीर्घायुष्य लाभते. स्नान न करणाऱ्याला याच्या उलट फळे - बुद्धिमांद्य, लंपटपणा, रोग, कुरूपता, निस्तेज कांती, अपकीर्ती, बलहीनता, दुःस्वप्न आणि अल्पायुष्य मिळते.६७. स्नानानंतर मृत्तिका (गोपीचंदन), होमानंतर भस्म आणि पूजेनंतर चंदन लावावे. शुक्ल पक्षात केशव, नारायण इत्यादि बारा नावांनी व कृष्ण पक्षात संकर्षण, वासुदेव इत्यादि पुढच्या बारा नावांनी गोपीचंदनादि धारण करावे.६८.

**ललाटोदरहृत्कण्ठ-दक्षकुक्षिभुजश्रुतिः । कुक्षिदोः श्रुतिपृष्ठाङ्ग-ककुन्मूलेन कं त्विति ।।६९।।**
**मृद्गन्धितिलकैरङ्क्या भस्मपुण्ड्रैः षडर्णतः । मृताशौचे न गन्धान्न माङ्गल्ये भस्म धारयेत् ।।७०।।**
**गयाश्राद्धाधानपट्ट-प्रेतकृत्योत्तरीयकम् । पादुका रौप्यमुद्रा न क्षौरं जीवत्पिता भजेत् ।।७१।।**
**रौप्यहैमीखड्गमुद्रा-वत्तर्जन्यल्पकाङ्गुलिः । साग्रागर्भचतुर्दर्भ-पवित्रानामिकोऽपि वा ।।७२।।**

ललाट, उदर, हृत्, कण्ठ, दक्ष+कुक्षिः+भुजः+श्रुतिः, कुक्षि+दोः श्रुति, पृष्ठ+अङ्ग, ककुत्+मूलेन कं तु इति मृत्+गन्धि+तिलकैः अंक्या। भस्म पुण्ड्रैः षडर्णतः। मृत+अशौचे गन्धात् न। माङ्गल्ये भस्म न धारयेत्।६९-७०। गयाश्राद्ध, आधान, पट्ट, प्रेतकृत्य, उत्तरीयकं, पादुका, रौप्यमुद्रा, क्षौरं जीवत्+पिता न भजेत्।७१। रौप्य+हैमी+खड्ग+मुद्रावत् तर्जनी+अल्पका+अङ्गुलिः वा स+अग्र+अगर्भ+चतुर्दर्भ+पवित्र+अनामिकः अपि।७२।

कपाळ, पोट, छाती, गळा, उजवी कूस, बाहू आणि कान, डावी कूस, बाहू आणि कान, पाठीवर, पाठीच्या वरच्या भागावर वरील बारा नावांनी लावून *'नमो नारायणाय'* मंत्राने मस्तकावर लावावेत. गोपीचंदन आणि गन्ध यांचे उभे टिळे लावावेत. भस्म तीन बोटांनी '*नमः शिवाय*' मन्त्राने आडवे त्रिपुण्ड्र लावावेत. अशौचात गन्ध लावू नये आणि मंगलकार्यांत भस्म लावू नये.६९-७०.

गयाश्राद्ध, अग्निहोत्र, श्रौतकर्म इत्यादि, योगपट्ट (संन्यासकर्मांतील), उत्तरक्रिया, उत्तरीय वस्त्र, खडावा, चांदीची अंगठी आणि क्षौर ही पिता जिवंत असेल तर वर्ज्य आहेत.७१. तर्जनीत चांदीची, अनामिकेत सोन्याची आणि करंगळीत पोलादाची अशा अंगठ्या धारण कराव्यात; किंवा टोकासह गर्भरहित चार दर्भाची दोन पवित्रे दोन्ही अनामिकांत घालावी.७२.

**मुक्ताङ्गुष्ठाल्पगोकर्णाकृतिहस्तेन कं त्रिभिः । केशवाद्यैः प्राश्य हस्तौ द्वाभ्यां प्रक्षाल्य चाधरौ ।।७३।।**
**द्वाभ्यां प्रोक्ष्यास्यमेकैकात् करं पादौ शिरोऽपरैः । आस्यं नासेक्षिणी कर्णौ नाभिं हृत्के भुजौ स्पृशेत् ।।७४।।**
**नासां साङ्गुष्ठतर्जन्याङ्गुष्ठेनास्यं च दृक्श्रुती । सानामिकेन साल्पेन नाभिं करतलाग्रतः ।।७५।।**
**हृद्बाहून्कं च सर्वाभिः स्पृशेदाचमनं त्विदम् । त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः स्पृशेत्कर्णमसंभवे ।।७६।।**

मुक्त+अङ्गुष्ठ+अल्प+गोकर्ण+आकृति+हस्तेन केशव+आद्यैः कं प्राश्य, द्वाभ्यां हस्तौ प्रक्षाल्य च द्वाभ्यां अधरौ प्रक्षाल्य, एक+एकात् आस्यं, (वाम)करं, अपरैः पादौ, शिरः, आस्यं, नासा, अक्षिणी, कर्णौ, नाभिं, हृत्, के, भुजौ स्पृशेत्।७३-७४। स+अङ्गुष्ठ+तर्जन्या नासां, अङ्गुष्ठेन आस्यं च, स+अनामिकेन स+अल्पेन दृक्+श्रुती, करतल+अग्रतः नाभिं हृत्, बाहुं च कं सर्वाभिः स्पृशेत्। इदं तु आचमनम्। असंभवे त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः कर्णं स्पृशेत्।७५-७६।

अंगठा आणि करंगळी मोकळी सोडून मधली तीन बोटे एकत्र धरून तळहात गाईच्या कानाप्रमाणे सखल करावा. त्यात पळीभर पाणी घेऊन (उडदाचा दाणा बुडेल इतके. आचमनाच्या वेळी उणे अधिक जलपान हे सुरापानासमान मानले आहे.) ते देवतीर्थाने (मनगटावरून) *'केशवाय स्वाहा'*, *'नारायणाय स्वाहा'* आणि *'माधवाय स्वाहा'* ह्या नामांनी तीन वेळा प्यावे. मग *'गोविंदाय नमः'* या नामाने उजवा व *'विष्णवे नमः'* या नामाने डावा हात धुवावा. मग *'मधुसूदनाय नमः'* व *'त्रिविक्रमाय नमः'* ह्या दोन नामांनी ओठांना पाणी लावावे. *'श्रीधराय नमः'* या नामाने पुन्हा हात धुवावा. *'हृषीकेशाय नमः'* आणि *'पद्मनाभाय नमः'* ह्या नावांनी पायांना, *'दामोदराय नमः'* नावाने डोक्याला, *'संकर्षणाय नमः'* म्हणत मुखाला, *'वासुदेवाय नमः'* व *'प्रद्युम्नाय नमः'* या नावांनी नाकपुड्यांना, *'अनिरुद्धाय नमः'* व *'पुरुषोत्तमाय नमः'* यांनी डोळ्यांना, *'अधोक्षजाय नमः'* व *'नरसिंहाय नमः'* यांनी कानांना, *'अच्युताय नमः'* याने बेंबीला, *'जनार्दनाय नमः'* या नावाने हृदयाला, *'उपेन्द्राय नमः'* म्हणून डोक्याला, *'हरये नमः'* आणि *'श्रीकृष्णाय नमः'* या नावांनी बाहूंना स्पर्श करावा. त्यानंतर अंगठा व तर्जनी यांनी नाकाला, अंगठ्याने मुखाला, अंगठा व अनामिकेनी डोळ्यांना, अंगठा व करंगळी यांनी कानांना, हाताच्या तळव्याने नाभीला, हाताच्या टोकाने हृदयाला आणि बाहूंना तसेच सर्व बोटांनी मस्तकाला स्पर्श करावा. म्हणजे आचमन पूर्ण होते. एवढे सगळे शक्य नसेल तर वरीलप्रमाणे तीन वेळा पाणी पिऊन हात धुतल्यावर कानाला स्पर्श करावा.७३-७६.

**माषमज्जनमात्राम्बु-पानेऽथ द्विरुपस्पृशेत् । मूत्राद्युत्सर्गशुद्ध्यूर्ध्वं स्नाने दाने सुरार्चने ।।७७।।**
**प्राक्परे कर्मसन्ध्यासु सुप्ते वासोधृतौ क्षुते । कासश्वासागमादानाध्ययनाशुद्धभाषणे ।।७८।।**
**श्मशानचत्वारगतौ पच्छौचे स्वाऽन्ययोः कृते । आचामेद्धीनसंभाषे स्त्रीशूद्रोच्छिष्टभाषणे ।।७९।।**
**रक्ताश्रुपातेऽसुयामे जलोत्तारेऽभिवादने । उच्छिष्टस्पर्शेऽपाने च याते कर्णं स्पृशेत्तु वा ।।८०।।**
**विप्रदक्षश्रुतौ देव-पाशीनेन्द्वग्न्यबाशुगाः । सन्ध्याज्ञानाद्भवेच्छूद्रः सन्ध्याहीनोऽशुचिर्द्विजः ।।८१।।**

पाने माष+मज्जन+मात्र अम्बु द्विः उपस्पृशेत्। मूत्र+आदि+उत्सर्ग+शुद्धि+ऊर्ध्वं; स्नाने, दाने, सुर+अर्चने, कर्म+सन्ध्यासु प्राक्, परे। सुप्ते, वास+उधृतौ, क्षुते, कास+श्वास+आगम+आदान+अध्ययन+अशुद्ध+भाषणे, श्मशान+चत्वार+गतौ, स्व+अन्ययोः कृते पत्+शौचे, हीन+संभाषे, स्त्री+शूद्र+उच्छिष्ट+भाषणे आचमेत्। रक्त+अश्रु+पाते, असुयामे, जल+उत्तारे, अभिवादने, उच्छिष्ट+स्पर्शे, अपाने याते च (आचमेत्) वा कर्णं तु स्पृशेत्।७७-८०। विप्र+दक्ष+श्रुतौ देवाः पाशी+इन+इन्दु+अग्नि+अप्+आशुगाः। द्विजः सन्ध्या+अज्ञानात् शूद्रः भवेत्। सन्ध्याहीनः अशुचिः।८१।

आचमनाच्या वेळी एक उडीद बुडेल इतकेच पाणी प्यावे. आचमन नेहमी दोन वेळा करावे. मूत्रादि उत्सर्गाच्या शुद्धीनंतर द्विराचमन करावे. स्नान, देवपूजा, देव-पितरादि कर्म आणि संध्या यांच्या पूर्वी आणि नंतर द्विराचमन करावे. झोपून उठल्यावर, वस्त्र नेसल्यावर, शिंक आल्यावर, खोकला किंवा दम लागल्यावर, अध्ययनानंतर, अशुची व्यक्तीशी भाषण केल्यावर, श्मशान किंवा चौरस्त्यावर गेल्यास, आपण स्वतः किंवा इतरांनी आपले पाय धुतल्यावर, हीनाशी संभाषण केल्यावर, स्त्री, शूद्र किंवा उष्टा (जेवणानंतर न आंचवलेला) यांच्याशी बोलल्यावर दोन वेळा आचमन करावे. रक्त किंवा अश्रू यांचा स्राव झाल्यावर, प्राणायामानंतर, पाण्यातून पोहून आल्यावर, अभिवादन केल्यावर, उष्ट्याचा स्पर्श झाल्यावर किंवा अपान वायू गेल्यावर आचमन करावे. किंवा कर्णस्पर्श तरी करावा.७७-८०. ब्राह्मणाच्या उजव्या कानात वरुण, सूर्य, चंद्र, अग्नी, जल, आणि वायू या देवता वसतात. ज्याला संध्या येत नाही असा ब्राह्मणही शूद्र होतो. संध्या न केलेला ब्राह्मण अपवित्र असतो.८१.

**विना संध्यावन्दनेन नाधिकारोऽन्यकर्मसु । सम्यग्ब्रह्मात्र ध्यायन्ति विप्राः सन्ध्या ततः स्मृता ।।८२।।**
**भाढ्या भहीनार्कयुक्ता तूत्तमा मध्यमाधमा । प्रातःसंध्याऽपरा तद्वत् सार्कार्कोना च भान्विता ।।८३।।**
**त्रिनाड्यधस्तामकृत्वा चतुर्थार्घ्यं प्रदापयेत् । अध्यर्धयामादासायं संध्या मध्याह्निकी स्मृता ।।८४।।**
**धृत्वानामिकाङ्गुष्ठैर् यतिवर्णी च पञ्चभिः । अन्यो नासां शनैर्वायुं सव्ययापूर्य शक्तितः ।।८५।।**
**प्रणवव्याहृतीः सप्त गायत्रीं शिरसा सह । त्रिर्जपन्कुम्भितं मन्दं दक्षनाड्या विरेचयेत् ।।८६।।**

सन्ध्या+वन्दनेन विना अन्य+कर्मसु अधिकारः न। अत्र विप्राः सम्यक् ब्रह्म ध्यायन्ति ततः सन्ध्या स्मृता।८२। प्रातः+सन्ध्या भा+आढ्या उत्तमा, भ+हीना मध्यमा, अर्क+युक्ता तु अधमा। अपरा तद्वत् स+अर्का (उत्तमा), अर्क+ऊना (मध्यमा) च भ+अन्विता (अधमा)।८३। त्रि+नाडी+अधः तां अकृत्वा चतुर्थ अर्घ्यं प्रदापयेत्। अधि+अर्ध+यामात् आसायं मध्याह्निकी संध्या स्मृता।८४। यति+वर्णी अल्पा+अनामिका+अङ्गुष्ठैः, अन्यो पञ्चभिः नासां धृत्वा सव्यया शनैः आपूर्य प्रणव सप्त व्याहृतीः गायत्रीं शिरसा सह कुम्भितः त्रिः जपन् मन्दं दक्ष+नाड्या विरेचयेत्।८५-८६।

संध्यावन्दन केल्याशिवाय इतर कर्मांचा अधिकार प्राप्त होत नाही. ब्राह्मण ब्रह्माचे सम्यक् (**सं**) ध्यान (**ध्या**) करतात म्हणून तिला संध्या म्हणतात.८२. आकाशात नक्षत्रे दिसत असतानाच केलेली प्रातःसंध्या उत्तम, नक्षत्रे मावळली असता केलेली मध्यम आणि सूर्योदयानंतर केलेली कनिष्ठ जाणावी. त्याचप्रमाणे सायंसंध्या सूर्य मावळायच्या आधी उत्तम, तो मावळल्यावर मध्यम आणि तारे उगवल्यावर कनिष्ठ जाणावी.८३. संध्येला तीन घटकांपेक्षा अधिक विलंब झाला तर प्रायश्चितासाठी चौथे अर्घ्य द्यावे. मध्याह्न संध्येचा काळ दीड प्रहर दिवसापासून संध्याकाळपर्यंत सांगितला आहे. प्रातः, संगव, मध्याह्न, पराह्ण आणि सायाह्न असे दिवसाचे पाच मुख्य भाग आहेत.८४. संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी करंगळी, अनामिका आणि अंगठा यांनी आणि गृहस्थ-वानप्रस्थांनी पाची बोटांनी नाक धरून अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून, डाव्या नाकपुडीने (इडा) हळूहळू पूरक करावा (श्वास आत घ्यावा). मग हनुवटी छातीला टेकवीत

**कार्योऽन्यथासुयामान्यो मूलबन्धोऽत्र सत्तमः । जालन्धरोड्डियाणाख्यौ कुम्भके रेचके हितौ ।।८७।।**

अन्यः असुयामः अन्यथा कार्यः। अत्र मूलबन्धः सत्तमः। जालन्धर+उड्डियाण+आख्यौ कुम्भके रेचके हितौ।८७।

कुंभक करून कार, सात व्याहृति गायत्री आणि शिरस यांचा तीन वेळा जप करावा आणि मग उजव्या नाकपुडीने श्वास उड्ड्याणबंध करून (पोट आत ओढून) हळूहळू सोडावा (रेचक). पूरकाच्या दुप्पट रेचकाचा काळ सांगितला आहे. अधिक वेगाने रेचक केल्यास बलहानी होऊ शकते.८५-८६.

दुसरा प्राणायाम करायचा असेल तर उलटा करावा. म्हणजे उजव्या नाकपुडीने (पिंगलेने) पूरक करून इडेने रेचक करावा. (हठयोगप्रदीपिका २:१०). कुम्भक करताना जालन्धर बंध चांगला तर रेचक करताना उड्डियाण बंध चांगला. हठयोगप्रदीपिकेत (३:७१) सांगितल्याप्रमाणे शिरांतील जालाचे बंधन करून अधोगामी नभोजल अडवतो तो जालंधर बंध. योगतारावलीत भ.पू.पा. शंकराचार्यांनी ह्या तीनही बंधांचे वर्णन असे केले आहे. गळा, पोट आणि गुदद्वार या तीन ठिकाणी जालंधर, उड्डियाण आणि मूल ह्या बंधत्रयांची ओळख पटली तर कालपाशाचा बंध कसा पडेल? उड्डियाण, जालंधर आणि मूल या बंधांनी जागलेली सर्पिणी पश्चिममुखांत प्रविष्ट झाली की वायूचे येणे-जाणे थांबते. *(जालंधरोणड्उानमूलबन्धान् जल्पन्ति कण्ठोदरपायुमूले। बन्धत्रयेऽस्मिन्परिचीयमाने बन्धः कुतो दारुणकालपाशैः।।१।। उड्याणजालन्धरमूलबन्धैरुन्निद्रितायामुरगाङ्गनायां। प्रत्यङ्मुखत्वात्प्रविशन्सुषुम्णां गमागमौ मुञ्चति गन्धवाहः।।२।।)*

अशा प्राणाचा निरोध केल्यावर प्रथम *ॐकार आणि भूः* इत्यादि व्याहृतींचा उच्चार करताना त्यांच्या भूः म्हणजे सर्व पदार्थांनी युक्त असा हा भूलोक आणि *ॐ* म्हणजे ब्रह्म असा विवेक आहे. *भूः*, *भुवः*, स्वः इत्यादि लोकांना ब्रह्मदृष्टीने पाहायचे आहे. ब्रह्म हे सर्वांत श्रेष्ठ असून भूर्भुवः इत्यादींना त्या पातळीला नेऊन ध्यान करावे (*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्*) असे ब्रह्मसूत्र (४:१:५) आहे.

**प्राणायामोऽघनिघ्नोऽयं कार्यः सर्वेषु कर्मसु । ग्रामाद्बहिः स्याद्द्विगुणं नद्यां शतगुणं फलम् ।।८८।।**
**तीर्थे सहस्रं सन्ध्यायामनन्तं सान्ध्यकर्मजम् । बहिःसंध्या सुरापानानृतोक्त्याद्यघहारिणी ।।८९।।**
**संध्यामुपासिष्य इति संकल्प्यादाय मार्जयेत् । गोकर्णाकृतिताम्रादि-पात्रे वामकरेऽप्यपः ।।९०।।**
**वरान्तैर्नान्तैः सथान्तैः क्रमात्के पादयोर्हृदि । आपोहिष्ठेति पच्छोपः प्रातर्मध्यन्दिने निशि ।।९१।।**
**सूर्यश्चापः पुनन्त्वग्निश्चेति प्राश्य ह्युपस्पृशेत् । सोङ्कारव्याहृत्योङ्कारयुग्देव्यप्सूक्ततो द्विजः ।।९२।।**

अयं अघ+निघ्नः प्राणायामः सर्वेषु कर्मसु कार्यः। ग्रामात् बहिः द्विगुणं फलं, नद्यां शतगुणं, तीर्थे सहस्रम् गङ्गायां अनन्तं सान्ध्य+कर्म+जं फलं स्यात्। बहिः+सन्ध्या सुरा+पान+अनृत+उक्ति+आदि+अघ+हारिणी।८८-८९। संध्यां उपासिष्य इति सङ्कल्प्य गोकर्णाकृति ताम्रादि पात्रे, वामकरे वा अपः आदाय मार्जयेत्।९०। आपोहिष्ठा इति पत्+शः क्रमात् वः+अन्तैः के, न+अन्तैः पादयोः 'स'+'थ'+अन्तैः हृदि अपः मार्जयेत्।९१। प्रातः 'सूर्यश्च' मध्यन्दिने 'आपः पुनन्तु' निशि 'अग्निश्च' इति आपः प्राश्य हि उपस्पृशेत्।९२।

हा पापनाशक प्राणायाम सर्वच कर्मांत अवश्यमेव करावा. त्यानंतर आचमन किंवा श्रोतृस्पर्श करावा. संध्येचे फळ गावापेक्षा गावाबाहेर - जलाशयादि स्थानी दुप्पट, तर नदीकाठी शतपट मिळते.८८. संध्याकर्माचे फल तीर्थस्थानी हजारपट तर गंगेत अनंतपट सांगितले आहे. बाहेर केलेल्या संध्येने सुरापान, असत्य भाषण इत्यादि पापांचा परिहार करते.८९. '*संध्यां उपासिष्ये*' असा संकल्प करून, गाईच्या कानाच्या आकाराच्या तांबे, चांदी इत्यादीच्या पात्रात किंवा डाव्या हातात पाणी घेऊन मार्जन करावे.९०. सकाळ, दुपार आणि सायंकाळी आपोहिष्ठादि तीन ऋचांच्या पादांनी पादाचे अंतिम अक्षर '*वः*' असेल तर डोक्यावर, '*न*' असेल पायांवर आणि '*स*' किंवा '*थ*' असेल छातीवर क्रमशः पाणी शिंपडून मार्जन करावे. मग प्रातःसंध्येत '*सूर्यश्च*', माध्याह्न संध्येत '*आपः पुनन्तु*' आणि सायंसंध्येत '*अग्निश्च*' या मंत्रांनी पाणी पिऊन आचमन करावे. या मंत्राचमनानंतर ॐकारासहित सात व्याहृती आणि ॐकारसहित गायत्री तसेच आपोहिष्ठादि नऊ ऋचांनी मस्तकावर मार्जन करावे.९१-९२.

**मार्जयेत्प्रतिमंत्रं के ऋतं चेति तृचान्तरे । निःश्वास्याघनरं स्मृत्वा दक्षनासापुटेन तं ।।९३।।**
**बहिर्निःसार्य हस्तेऽप्सु पतितं नावलोकितं । क्षिप्त्वा क्षितौ वामभाग आचम्याप्पूरिताञ्जलिः ।।९४।।**
**गोशृङ्गमात्रमुद्धृत्याञ्जलिं व्यङ्गुष्ठतर्जनीम् । तिष्ठन्ध्यायन्संमुखोऽर्कं देव्यार्घ्यं त्रिर्निवेदयेत् ।।९५।।**
**असावादित्यो ब्रह्मेति ध्यात्वासिच्य प्रदक्षिणम् । परीत्याचामेन्मध्याह्ने नतोऽर्घ्ये हंस इत्यृचा ।।९६।।**
**जपेद्गृहाद्बहिर्द्विघ्नं त्रिघ्नं नद्यां शतं फलम् । गोष्ठे वनेऽग्निहोत्रे च हरहर्यग्रतोऽमिति ।।९७।।**

स+कार+व्याहृति+ॐकार+युक्+देवी अप्+सूक्ततः द्विजः प्रतिमंत्रं के मार्जयेत्। 'ऋतं च' इति ऋचा अंतरे निःश्वास्य अघनरं स्मृत्वा तं दक्ष+नासा+पुटेन बहिः निःसार्य हस्ते अप्सु पतितं न अवलोकितं वामभागे क्षितौ क्षिप्त्वा आचम्य अप्+पूरित+अञ्जलिः...।९३-९४। संमुखः तिष्ठन् अर्कं ध्यायन् वि+अङ्गुष्ठ+तर्जनीं अञ्जलिं गो+शंङ्ग+मात्र उद्धृत्य देव्या अर्घ्यं त्रिः निवेदयेत्।९५। 'असावादित्यो ब्रह्म' इति प्रदक्षिणम् परीत्य आसिच्य आचामेत्। मध्याह्ने अर्घ्ये नतः 'हंस' इति ऋचा (अर्घ्यं दद्यात्)।९६। जपे गृहात् बहिः द्विघ्नं, नद्यां त्रिघ्नं, गोष्ठे शतगुणं, वने, अग्निहोत्रे च हर+हरि+अग्रतः अमिति।९७।

**अघमर्षण -** 'ऋतं चेति' या तीन ऋचांनी आपल्या हातातले पाणी हुंगून पापपुरुषाचे स्मरण करावे आणि उजव्या नाकपुडीने त्याचे बाहेर हातांतल्या पाण्यांत निःसारण करावे आणि ते पाणी न पाहता डाव्या बाजूला जमिनीवर टाकावे.९३-९४.

**अर्घ्य -** ओंजळीत पाणी घेऊन सूर्याभिमुख उभे राहून त्याचे ध्यान करीत अंगठा आणि तर्जनी वगळलेल्या ओंजळीने पाणी गाईच्या शिंगाइतकी दूर धरून ओंजळीतील पाणी वर उचलून गायत्रीमंत्राने तीन वेळा अर्घ्य द्यावे.९५.

अर्घ्यदानानंतर *'असावादित्यो ब्रह्म'* या मंत्राने सूर्याचे ध्यान करीत, जो या पुरुषात आहे तोच त्या आदित्यांत आहे या श्रुतीच्या (तैत्तिरीय उपनिषद २:८) साराचे चिंतन करीत, आपल्याभोवती पाणी शिंपडत उजवी प्रदक्षिणा करावी आणि आचमन करावे. माध्याह्न संध्येत *'हंसः शुचिषत्'* या मंत्राने वाकून अर्घ्य द्यावे.९६. घराबाहेर जप केल्यास दुप्पट फळ, नदीवर केल्यास तिप्पट, गोठ्यात शतगुण, वनांत, अग्निहोत्रस्थानी किंवा हरिहरांच्या मूर्तीसमोर अपरिमित फळ लाभते.९७.

**काष्ठासनेऽकीर्त्यकर्णं दौरात्म्यं पल्लवेंऽशुके । दैन्यं रुग्ग्राव्ण्यथाऽऽरोग्यं भसिते कम्बले सुखम् ॥९८॥**
**विदैणेयेजिने द्वैपे मोक्षः प्रज्ञायुषी कुशे । व्याहृत्यास्मिन्सिद्धपद्म-स्वस्तिकाद्यासनात्सुखं ॥९९॥**
**उपविश्य क्षमां प्रार्थ्य भूतान्युत्सार्य भावयेत् । यथाङ्गमात्मन्यात्मानं देव्या तद्रूपमेकधीः ॥१००॥**

काष्ठ+आसने अकीर्ति+अक+ऋणं, पल्लवे दौरात्म्यं, अंशुके दैन्यं, ग्राव्णि रुक्, भसिते आरोग्यं, कम्बले सुखं,।९८। ऐणेये अजिने विद्, द्वैपे मोक्षः, कुश+आसने प्रज्ञा+आयुषी। अस्मिन् सिद्ध+पद्म+स्वस्तिक+आदि आसनात् सुखं व्याहृत्या उपविश्य,।९९। क्षमां प्रार्थ्य, भूतानि उत्सार्य, एक+धीः यथा अङ्गं देव्या आत्मनि आत्मानं तत्+रूपं भावयेत्।१००।

**आसनविचार -** लाकडाच्या आसनावर बसल्यास अपकीर्ती, दुःख आणि ऋण, पानाच्या आसनावर किंवा वस्त्रावर बसल्यास दुःस्वभाव, दगडावर बसल्यास दैन्य आणि रोग अशी फळे आहेत. अर्थात वरील आसनांवर बसू नये. भस्मावर बसल्यास आरोग्य, लोकरीच्या आसनावर सुख, मृगाजिनावर ज्ञान, व्याघ्राजिनावर मोक्ष आणि कुशासनावर बुद्धी आणि आयष्याची वृद्धी अशी फळे आहेत. अर्थात या आसनांवर बसावे. हे झाले ज्याच्यावर बसायचे (*आस्यते अस्मिन इति आसनम्*) त्या आसनाविषयी. आता ज्या पद्धतीने बसायचे (*आस्यते अनेन इति आसनम्*) त्याविषयी सांगतात. सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादींपैकी एका आसनावर सात व्याहृतींचा उच्चार करून विधिपूर्वक सुखाने बसावे. या आसनांचे वर्णन हठयोगप्रदीपिकेत (१:२१,२५,३७) पाहावे.९८-९९.

*‘पृथ्वि त्वया’* या मंत्राने भूमीची प्रार्थना करून, *‘अपसर्पन्तु ते भूता’* आणि *‘अपक्रामन्तु भूतानि’* या मंत्रांनी भूतांना दूर सारून, एकचित्ताने गायत्री आपल्या हृदयादि अंगांत कल्पून आपण तद्रूप आहोत अशी भावना करावी.१००.

**आर्षदैवतछन्दांसि स्मरन्नक्षरपूर्वकान् । न्यासान्कृत्वाऽखिला मुद्राः प्रदर्श्य मनुदेवताम् ।।१०१।।**
**तां बालां बालादित्येति त्रिभिर्ध्यानैस्त्रिकालतः । ध्यात्वा चागच्छ वरद इति तिष्ठन्समाहितः ।।१०२।।**
**प्रागास्यो मन्त्रार्थमनु-सन्दधानो जपेच्छनैः । सोङ्कारव्याहृतिं देवीं छिन्नपादां स्रजांशुके ।।१०३।।**

आर्ष+दैवत+छंदांसि स्मरन् अक्षर+पूर्वकान् न्यासान् कृत्वा, अखिला मुद्रा प्रदर्श्य मंत्रदेवतां (स्मरन्)।१०१। 'तां बालां बालादित्य' इति त्रिभिः ध्यानैः त्रिकालतः च 'आगच्छ वरदे' इति ध्यात्वा समाहितः प्राक्+आस्यः तिष्ठन् मंत्र+अर्थ+अनुसंधानः स+ओंकार+व्याहृतिं छिन्न+पादां देवीं अंशुके स्रजा शनैः जपेत्।१०२-१०३।

गायत्रीमंत्राचे विश्वामित्र ऋषी, सविता देवता आणि गायत्री छंद यांचे स्मरण करून गायत्रीच्या चोवीस अक्षरांनी न्यास करून मंत्रदेवतेला सर्व मुद्रा दाखवाव्यात. देवी या पदाने इथे गायत्री जाणावी. आत्मस्वरूपाचे यथार्थ प्रकाशन तीच करते. तीच ब्रह्मज्ञानाचे उपादान - प्रमुख साधन आहे. कारण तीच सर्व छंदांत प्रधान आहे; ती सोमाचे आहरण करते; इतर छंदांची अक्षरे तिच्यात सामावलेली असल्याने ती सर्व छंदांना व्यापून आहे; ती सर्व सवनांना व्यापून आहे. या कारणांनी मंत्रजपात गायत्रीलाच प्राधान्य आहे. विशेषतः ब्राह्मणांचे सत्त्व गायत्रीच आहे. म्हणूनच सर्वश्रेष्ठ गायत्रीमंत्र सोडून इतर कोणताही श्रेष्ठतर मंत्र नाही. त्यासाठी संन्याशांशिवाय इतर सर्व द्विजातींनी तीनही काळात (प्रातः, मध्याह्न, सायं) गायत्रीचाच जप करावा.१०१.

पुढे त्या गायत्रीचे सकाळी '*तां बालां बालादित्यमंडलस्थां*' हे ब्राह्मी, मध्याह्नाला वैष्णवी आणि सायंकाळी शैवी या तीन ध्यानांपैकी कालानुरूप, '*आगच्छ वरदे देवी*' म्हणत गायत्रीचे ध्यान करावे.१०२. मग चित्त समाहित (एकाग्र) करून पूर्वाभिमुख उभे राहावे. गायत्रीमंत्राच्या अर्थाकडे लक्ष देत, ओंकार आणि व्याहृतींसह गायत्रीचा तीन पाद तोडून सावकाश जप करावा. माळ वस्त्रांत धरलेली असावी.१०३.

**मत्रकारौ मनस्त्राणौ तद्योगान्मन्त्र उच्यते । जन्मविच्छेदपापघ्नौ जपकारौ तु तद्युजा ।।१०४।।**

म+त्र+कारौ मनः+त्राणौ तत् योगात् मन्त्र उच्यते। जन्म+विच्छेद+पापघ्नौ ज+प+कारौ तु तत् युजा।१०४।

**गायत्री मंत्राचा संक्षिप्त अर्थ.**

**तत्** म्हणजे गीतेच्या वचनानुसार (१७:२३) परब्रह्म;

**सवितुः** सविता म्हणजे प्रसविता - जनिता. हे सृष्टी, प्रलय आणि स्थिती यांचे उपलक्षण. या संपूर्ण चराचर जगदाभासाचे अधिष्ठानभूत परब्रह्म;

**वरेण्यं** सूक्ष्म बुद्धीनेच आकळण्याजोगे निरतिशय आत्मस्वरूप;

**भर्गो** सर्व अनर्थांचे मूळ असणाऱ्या अविद्या, काम, कर्म आदि दोषांचे भर्जन करणारे, त्यांना जाळून टाकणारे (स्वरूप);

**देवस्य** द्योतनात्मक - स्वयंप्रकाश आणि सर्वप्रकाशक; गीतेच्या (१५:६) भाषेत जिथे न सूर्य प्रकाशतो, न चंद्र न अग्नी, जिथे पावल्यावर पुन्हा संसारात परतत नाही ते माझे परम धाम आहे. (*न तद्भासयते सूर्यो न शंशाङ्को न पावकः। यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।।*). याच अर्थाचा मंत्र कठ उपनिषदांतही (२:५:१५) आहे.

**धीमही** (आम्ही) चिंतन करतो.

**यः** जो जीवात्म्याहून अभिन्न असा परमात्मा.

**नः** आमच्या

**धियः** बुद्धीच्या वृत्तीना

**प्रचोदयात्** प्रेरणा करो.

**प्रोक्तो जपो हि यज्ञोऽयं सर्वयज्ञेषु तूत्तमः। वाचिकोऽसन्मानसः सन् रहस्यो मध्यमो जपः ।।१०५।।**

सर्व+यज्ञेषु तु अयं जपः हि उत्तमः प्रोक्तः। वाचिकः जपः असन्, मानसः सन् रहस्यः मध्यमः।१०५।

सारांश, सर्वसाक्षी, अखिल द्वैतभ्रमाचे अधिष्ठान, परमानंदस्वरूप, सर्व अनर्थांचा निरास करणारे, स्वप्रकाश, चिद्रूप अशा ब्रह्माचे चिंतन करावे. असे चिंतन केल्याने ब्रह्मावर, दोरीवर जसा सापाचा, तशा झालेल्या आभासाचा किंवा विवर्तरूप अध्यारोपाचा अपवाद - निरास, होऊन जीवात्मा आणि परमात्मा यांचे सामान्याधिकरण (एकरूपतेचा निश्चय) होते. या मंत्राच्या अर्थाचे अनुसंधान जपाच्या वेळी करावे. एकदा सांगून ज्ञान झाले नाही तर त्याची वरचेवर आवृत्ती करावी (*आवृत्तिरसकृदुपदेशात्।*) या न्यायानुसार (ब्र.सूत्र ४:१:१) साक्षात्कार होईपर्यंत वरचेवर जप करीत राहावे.

**म**कार म्हणजे मन आणि **त्र**कार म्हणजे त्राण किंवा राखण. यांच्या संयोगाने **मन्त्र** हा शब्द झाला. मनाचे रक्षण करतो तो मंत्र. **ज** म्हणजे जन्मविच्छेद आणि **प** म्हणजे पापनाश यांच्या संयोगाने **जप** शब्द होतो. जन्ममरणांचा छेद करून पापाचा नाश करतो तो जप असा याचा अर्थ.१०४. सर्व यज्ञांत भगवंतांनी हा जपयज्ञच उत्तम मानला आहे (*यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।* भ.गीता १०:२५). हा यज्ञसुद्धा न केला तर तुलनेने कमी सुखाचा हा मानवलोकही मिळणे अशक्य आहे. मग इतर लोकांचा तर विचारच नको. (*नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम।* भ.गीता ४:३१) मोठ्याने उच्चार करून म्हटलेला जप निकृष्ट होय. जीभ किंवा ओठही न हलता केलेला मानसिक जप उत्तम होय. उच्चार न करता पण जीभेची/ओठांची हालचाल करून केलेला रहस्य (*उपांशु*) जप मध्यम जाणावा.१०५.

**शाखारेखाशङ्खमणि-प्रवालस्फटिकैर्जपे । मुक्तापद्माक्षीस्वर्णाक्षैर् दशोत्तरगुणं फलम् ।।१०६।।**
**प्रोक्षिता स्रक् सती मेरु-लङ्घने स्रक्च्युतौ जपे । तन्द्र्यादौ च जपाच्छुद्धिर् देवीं नासाग्रदृग्जपेत् ।।१०७।।**
**यतिर्जपेत्षडोङ्कारां सहस्रं चाष्टयुक्शतम् । अन्योऽष्टाविंशतिं पङ्क्तिं नार्थार्थं तां जपेद् द्विजः ।।१०८।।**
**मैत्रैः सौरैरुपस्थाय वारुणैश्च क्रमात्सदा । जातवेदसे तच्छंयोस् त्रिर्नमो ब्रह्मणे इति ।।१०९।।**

जपे शाखा+रेखा+शंख+मणि+प्रवाल+स्फटिकैः मुक्ता+पद्माक्षी+ स्वर्ण+अक्षैः दश+उत्तर+गुणं फलम्।१०६। स्रक् प्रोक्षिता सती। जपे मेरु+लङ्घने, स्रक् च्युतौ, तन्द्री+आदौ च जपात् शुद्धिः। देवीं नास+अग्र+दृक् जपेत्।१०७। यतिः षट्+ओंकारां सहस्रं जपेत्। अन्यः अष्ट+युक् शतं, अष्टाविंशतिं, पङ्क्तिं (जपेत्)। द्विजः तां अर्थ+अर्थं न जपेत्।१०८। मैत्रैः सौरैः वारुणैः च क्रमात् उपस्थाय, सदा जातवेदसे, तच्छंयोः त्रिः नमो ब्रह्मणे इति।१०९।

बोटांनी, बोटांच्या पेरांनी किंवा शंख, मणी, प्रवाळ, स्फटिक, मोती, पद्माक्षी, सोन्याचे मणी आणि रुद्राक्ष यांच्या माळांनी जप करावा. हे सर्व एकाहून एक दसपट अधिक फळ देतात. म्हणजे बोटांच्या जपाच्या दसपट पेरांनी जप केल्याचे फळ, त्याच्या दसपट शंखांच्या माळेने केलेल्या जपाचे फळ इत्यादि. माळा १०८ मण्यांच्या असाव्या. स्त्रियांना - विशेषतः सुवासिनींना रुद्राक्ष व तुळशीच्या माळा निषिद्ध आहेत.१०६. माळ प्रोक्षण करून घेतलेली चांगली. जप करताना माळ पडली, मेरुमणी ओलांडला किंवा झोप आली तर दोष सांगितला आहे. त्याची अधिक जपाने (किमान एक माळ) शुद्धी होते. गायत्रीचा जप करताना दृष्टी नासिकेच्या अग्रावर (मुळावर? आज्ञाचक्रावर) ठेवावी.१०७. यति शब्दाने इथे बहूदक आणि कुटीचक संन्यासी अभिप्रेत आहेत. त्यांनी सहा ओंकारयुक्त गायत्री मंत्राचा एक हजार जप करावा. ब्रह्मचारी, गृहस्थ आणि वानप्रस्थ यांनी एकशे आठ जप करावा. अशक्त असेल तर किंवा अडचणीच्या वेळी अठ्ठावीस अथवा दहा जप केला तर चालेल. द्विजांनी पैशासाठी गायत्री जप करू नये.१०८. जपानंतर प्रातःकाली मित्रदेवतात्मक *'मित्रस्य चर्षणी धृतो,'* माध्याह्नी सूर्यदेवतात्मक *'उदुत्यं जातवेदसे'* आणि सायंकाळी वरुणदेवातात्मक *'तत्त्वायामि'* या मंत्रांनी उपस्थान करावे. तिन्ही काळी *'जातवेदसे', 'तच्छयोः'* यांनी उपस्थान करून आणि *'नमो ब्रह्मणे'* या मंत्रांचे तीन वेळा पठण करावे.१०९.

**प्रणम्य दिक्तत्पदेव-विप्रान्सन्ध्यां विसृज्य च । गुरुं निषण्णं प्रागास्यं संमुखोऽत्राभिवादयेत् ।।११०।।**
**कराभ्यां यथावामान्य-कर्णौ स्पृष्ट्वा पदौ गुरोः । व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरोऽङ्घ्र्योर्न्यसेत्तदभिवादनम् ।।१११।।**
**हृद्दृग्वाक्पत्कोरुवक्षः-करैर्देवान्नमेद्वरान् । ज्ञानल्पानपि सद्विप्रान् पाणिभ्यान्नाशुचीन्नमेत् ।।११२।।**
**कर्मस्थाग्न्यादिहस्तान्तद्वत्स्वयं चाल्पकान्करात् । उद्वाहोर्ध्वं चरेत्सायं प्रातरौपासनं स्वयम् ।।११३।।**

दिक्+तत्+प+देव+विप्रान् प्रणम्य, सन्ध्यां विसृज्य च प्राक्+आस्यं गुरुं संमुखः अत्र अभिवादयेत्।११०। कराभ्यां यथा+वाम+अन्य+कर्णौ स्पृष्ट्वा, गुरोः पदौ व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरः अङ्घ्र्योः न्यसेत् तत् अभिवादनम्।१११। हृत्+दृक्+वाक्+पत्+क+उरु+वक्षः+करैः देवान् नमेत्। वरान्, अल्पान् अपि ज्ञान्, सत्+विप्रान् पाणिभ्यां नमेत्।११२। अशुचीन्, कर्मस्थान्, अग्निहस्तान्, तद्वत् स्वयं न (नमेत्)। अल्पकान् करात् (नमेत्)। उद्वाह+ऊर्ध्वं स्वयं सायं प्रातः औपासनं चरेत्।११३।

प्राच्यादि दिशा, त्यांचे इंद्रादि दिक्पाल आणि सर्व ब्राह्मणांना प्रणाम करून '*उत्तमे शिखरे*' मंत्राने संध्येच्या विसर्जनानंतर पूर्वाभिमुख बसलेल्या गुरूंना सामोरे जाऊन किंवा इतर वेळीही अभिवादन करावे.११०.

अभिवादन कसे करावे ते सांगतात. आपल्या डाव्या हाताने डाव्या कानाला आणि उजव्या हाताने उजव्या कानाला स्पर्श करून, उजवा हात डाव्या हातावरून गुरूंच्या उजव्या पायाला लावावा व डावा हात डाव्या पायाला लावावा आणि मग आपले मस्तक त्यांच्या पायांवर ठेवावे.१११. देवांना मन, दृष्टी, वाणी, पाय, शिर, मांड्या आणि हात ही आठ अंगे जमिनीला टेकून साष्टांग नमस्कार करावा. आपल्यापेक्षा मोठे, वयानेही लहान असलेले ज्ञानी, सात्त्विक ब्राह्मण यांना दोन्ही हात जोडून नमस्कार करावा.११२. सूतकी इत्यादि अशुद्धांना, कर्म करीत असणारा, अग्नी किंवा समिधा हातात असलेल्यांना, तसेच स्वतः अशुची, कर्मांत किंवा अग्निधारी असल्यास, नमस्कार करू नये. शूद्रादि हीनांना एका हाताने नमस्कार करावा.११३.

**पत्नी वान्यतराग्रेऽन्यश् चेद्धमन्या प्रबोध्य तम् । प्रादुष्कृताग्निं ध्यात्वालङ्कृत्य संस्कृत्य हौम्यकम् ।।११४।।**
**ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः सूर्याय चाग्नये । सायं तूष्णीं तूभयत्र द्वितीयां जुहुयात्ततः ।।११५।।**
**उपतिष्ठेत्स्वर्चिताग्निः सूर्याग्निमनुभिः क्रमात् । कायाभ्यां तूभयत्रात्र षष्टिधान्यमिताहुतिः ।।११६।।**

पत्नी वा अन्यः चेत् अन्यतर+अग्रे। तं धमन्या प्रबोध्य प्रादुष्कृत+अग्निं ध्यात्वा अलङ्कृत्य, हौम्यकं संस्कृत्य।११४। ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः 'सूर्याय', सायं 'अग्नये', तूष्णीं ('प्रजापतये' इति) द्वितीयां जुहुयात्।११५। सु+अर्चित+अग्निः उपतिष्ठेत् क्रमात् सूर्य+अग्नि+मन्त्रैः उभयत्र कायाभ्यां उपतिष्ठेत्। अत्र षष्टि+धान्य+मिता आहुतिः।११६।

**अग्नीची उपासना -** विवाहानंतर रोज सकाळी व सायंकाळी अग्नीची उपासना करावी. किंवा पत्नीने करावी. आश्वलायन गृह्य सूत्रांत (१:९:१-२) दिल्याप्रमाणे पुत्र, कुमारी, अन्तेवासी किंवा नित्य अनुग्रहीत यांनी केल्यास ते स्वतः किंवा पत्नीच्या समोर करावे. वेळूच्या फुंकणीने अग्नी प्रज्वलित करावा. मुखाने करू नये. प्रज्वलन सूर्योदयाच्या पूर्वी किंवा सूर्यास्ताच्या पूर्वी करावे. यात विलंब झाला तर व्याहृतिहोम करून श्रुत्युक्त प्रायश्चित्त घ्यावे. प्रज्वलित अग्नीचे ध्यान करावे. परिसमूहन आणि परिस्तरण करून अग्नीला अलंकारावे. मग होमद्रव्यावर संस्कार करावा.११४. प्रातःकाळी (सूर्योदयापासून संगवापर्यंत) '*सूर्याय इदं न मम*' या मंत्राने व रात्री (सूर्यास्तापासून दहा घटकापर्यंत) '*अग्नय इदं न मम*' या मंत्राने अग्नीच्या ज्वालांत समिधांची आहुती घालावी. दोन्ही वेळा मंत्र मनातच म्हणावा. नंतर '*प्रजापतय इदं न मम*' या मंत्राने दुसरी आहुती द्यावी.११५.

परिस्तरणाचे विसर्जन करून परिसमूहादिकांनी अग्नीची पूजा करून मग सकाळी सूर्य आणि सायंकाळी अग्नीच्या मंत्रांनी व दोन्ही वेळा प्रजापतीच्या मंत्रांनी, '*हिरण्यगर्भःप्रजापत*' (शुक्ल यजुर्वेद २३:१:१, २३:६५:१) उपस्थान करावे. या स्थानी साठ साळींची आहुती द्यावी. शंभर तांदूळांचा प्रस्थ किंवा चौसष्ट अंशांची आहुती द्यावी. उशीर झाल्यास चौपट तुपाने व्याहृतिहोम करावा. संकटकाळी सम होमाचा किंवा तीन पक्षांनी पक्षहोमाचे पर्याय अवलंबावेत.११६.

**पयोदध्याज्यनीवार-यवव्रीह्यादि हौम्यकम् । गृह्यं परिचरेच्छ्रौताग्नीन्वापि ज्ञाततद्वृषः ।।११७।।**
**नातीयाद्ब्राह्मणो यज्ञान् नित्यमासिकवार्षिकान् । नाहोतीयाद्विना दानं शक्त्या दद्यात् किमप्युत ।।११८।।**
**भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्सर्वदाऽसकृत् । संस्कृते साररे च्छन्ने स्वे गृहे निवसेद्गृहि।।११९।।**
**भूः पूताप्युपलिप्ता चेत् पुनर्लेपेन शुद्ध्यति। तन्नित्यं वास्तूपलिम्पेत् प्रेताद्योऽलिप्तकेऽस्ति हि ।।१२०।।**

पयः+दधि+आज्य+नीवार+यव+व्रीहि आदि हौम्यकम्। गृह्यं परिचरेत्। श्रौत+अग्नीन् वा अपि ज्ञात+तत्+वृषः।११७। ब्राह्मणः नित्य+मासिक+वार्षिकान् यज्ञान् न अतीयात्। विना दानं न आहोतीयात्। शक्त्या किं अपि उत दद्यात्।११८। सर्वदा असकृत् भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्। गृही संस्कृते स+अररे छन्ने गृहे निवसेत्।११९। भूः पूता अपि उपलिप्ता चेत् पुनः+लेपेन शुद्ध्यति। तत् वास्तुं नित्यं उपलिम्पेत्। अलिप्तके प्रेताद्याः अस्ति हि।१२०।

दूध, दही, तूप, देवसाळ, जवसाळ, तादूळ ही हवनीय द्रव्ये आहेत. अशा प्रकारे गृह्य अग्नीची किंवा त्याचे विधिविधान जाणून श्रौत अग्नीची परिचर्या करावी. ईशावास्यातील (११,१२) '*विद्यां चाविद्यां*' या प्रतिपादनानुसार कर्माविषयी ज्ञानाच्या अभावांत अनिष्टाची संभावना असते.११७. ब्राह्मणानी नित्याचे पाच महायज्ञ, तसेच दर्श, आग्रयण इत्यादि मासिक व वार्षिक यज्ञ चुकवू नयेत. तसेच दानाशिवाय होम करू नये. शक्त्यनुसार कांही थोडे तरी द्यावेच.११८.

वर सांगितलेल्या '*यस्य स्मृत्या*'... '*प्रमादं कुर्वतां*' या स्मृतिवचनांप्रमाणे कर्मातील न्यूनता दूर करण्यासाठी वारंवार भगवान विष्णूंचे स्मरण करावे. गृहस्थाने वास्तुशांत्यादींनी संस्कारलेल्या, भिंतीनी व छताने आच्छादलेल्या, कपाटांनी युक्त अशा आपल्या स्वतःच्या घरात राहावे. कपाटांनी रहित, नीट न झाकलेले आणि ज्या घरांत बली आणि भोजन दिले जात नाही त्यांत प्रवेशही करू नये. ते संकटांचे आगर असते. '*अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं। गृहं न प्रविशेद्धीमानापदामाकरो हि सः।।*' (निर्णयसिंधू.)११९. महागरुडपुराणांत (प्रेतखंड, धर्मकांड २:१०) सांगितल्याप्रमाणे भूमी सर्वत्र पवित्रच असली तरी एकदां सारविलेली जमीन पुन्हा सारवल्याने शुद्ध होते. (*सर्वत्र वसुधा पूता यत्र लेपो न विद्यते। यत्र लेपो भवेत्तत्र पुनर्लेपेन शुद्ध्यति।।*'). यासाठी जमीन रोज सारवावी. न सारवलेल्या जमिनीवर भूतप्रेतादिकांचा वावर असतोच.१२०.

**कांस्यांशुकेऽत्र गर्ह्ये गो-विशा नैर्ऋतितो गृहम् । उपलिप्य स्वलङ्कार्यं रङ्गवल्ल्यादिनान्वहम् ।।१२१।।**
**स्थाप्यं गव्यं तिलाश्चर्म मणिश्रीखण्डधेनवः । त्रिसन्ध्येऽर्च्योऽमरः प्रातर्विस्तराच्चन्दनादिना ।।१२२।।**
**मध्याह्ने निशिदीपैर्वा गोवज्जन्मान्यथा द्विज । गुर्वर्काग्न्यम्ब्वष्टधार्चा गोविप्रान्यतमार्चनम् ।।१२३।।**
**कुर्यात्तिष्येऽजसामीप्यं शालिग्रामे तमप्युत । गुर्वाज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्स प्रसीदति ।।१२४।।**
**देवो भक्ततपोयोगादृच्छत्यर्चनगौरवात् । बिम्बाभिरूप्यात्सामीप्यं भक्तिरेवात्र कारणम् ।।१२५।।**

अत्र कांस्य+अंशुके गर्ह्ये। गो+विशा नैर्ऋतितो गृहं उपलिप्य रंग+वल्ल्यादिना अन्वहं सु+अलङ्कार्यम्।१२१। गव्यं तिलाः चर्म मणि+श्रीखंड+धेनवः स्थाप्यम्। त्रिसन्ध्ये अमरः अर्च्यः। प्रातः विस्तरात्।१२२। मध्याह्ने चन्दनादिना, निशि दीपैः वा। (हे) द्विज, अन्यथा जन्म गोवत्। गुरु+अर्क+अग्नि+अम्बु+अष्टधा +अर्चा गो+विप्र+अन्यतम अर्चनम्।१२३। तिष्ये शालिग्रामे अज+सामीप्यम्। तं अपि उत गुरु+आज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्। सः प्रसीदति।१२४। देवः भक्त+तपो+योगात्, अर्चन+गौरवात्, बिम्ब+आभिरूप्यात् सामीप्यं ऋच्छति। अत्र भक्तिः एव कारणम्।१२५।

सारवतांना कांशाचे भांडे किंवा वस्त्र ही निषिद्ध आहेत. गाईच्या शेणाने नैर्ऋत्य कोपऱ्यापासून सुरुवात करून घर सारवावे. नंतर ते रोज रांगोळ्यांनी वगैरे चांगले सजवावे.१२१. **देवपूजा -** घरात दूध-दुभते, तीळ, मृगाजिन, शाळिग्राम, चंदनाचे खोड आणि दुभती गाय ठेवावेत. त्रिकाळ देवपूजा करावी. सकाळी सविस्तर पूजा करावी.१२२. माध्याह्नी चंदनादींनी पंचोपचार पूजा व रात्री आरती करावी. अन्यथा हा जन्म पशुवत् जाणावा. गुरू, सूर्य, गृह्याग्नी, तीर्थादि जल, शास्त्राभिमत देवतांच्या आठ प्रकारच्या मूर्ती (काष्ठ, पाषाण, सुवर्णादि धातु, वालुका, मृत्तिका, चित्र, रत्नमणी, मनोमयी), गाय, वेदज्ञ ब्राह्मण यांपैकी एकाची पूजा करावी.१२३. कलियुगात शाळिग्रामात विष्णूचा वास असतो, त्याचीही पूजा करावी. गुरूंची आज्ञा घेऊन भक्तिभावाने पूजा केल्याने देव प्रसन्न होतो.१२४. भक्ताच्या तपोरूपी योगाने, अर्चनाच्या विपुलतेने आणि प्रतिमेच्या सौंदर्याने देव सामीप्य प्रदान करतो. यांत सर्वातही भक्ती हेच कारण आहे.१२५.

**नाश्रद्धधानोऽधिकारी संशयात्मात्र नास्तिकः । येभ्यो मातेति पुंगन्धं निवार्यादाय चाखिलान् ।।१२६।।**
**संभारानुपविश्याग्रे देवस्याप्पूरितं घटम् । दक्षभागे निधायाब्जं प्रपूज्य प्रोक्ष्य तत्स्थलम् ।।१२७।।**
**स्वं संभारांश्च भूभूत-शुद्धिं कृत्वा यथायथम् । प्राणान्प्रतिष्ठाप्य चान्तर् बहिर्मातृकया न्यसेत् ।।१२८।।**
**तनौ देवेऽपि पूंसूक्त-मन्त्रैश्चापि यथाक्रमम् । कराङ्घ्र्यूरुकटीनाभि-हृद्ग्रीवादोर्मुखाक्षिके ।।१२९।।**

अत्र अश्रद्धधानो संशयात्मा, नास्तिकः अधिकारी न। 'येभ्यो माता' इति पुं+गन्धं निवार्य अखिलान् संभारान् आदाय।१२६। उपविश्य, देवस्य अग्रे दक्षभागे घटं निधाय, अब्जं प्रपूज्य, तत् स्थलं प्रोक्ष्य, प्राणान् प्रतिष्ठाप्य च अन्तः बहिः मातृकया न्यसेत्।१२७-१२८। तनौ देवे अपि पुंसूक्त+मन्त्रैः च अपि यथाक्रमं कर+अङ्घ्रि+ऊरु+कटी+नाभि+हृत्+ग्रीवा+ दोः+मुख+अक्षिके (न्यसेत्)।१२९।

श्रद्धाहीन, संशयग्रस्त आणि नास्तिक यांना देवपूजेचा अधिकार नाही. '*शोकाक्रान्तः कृपाविष्टः श्रद्धया रहितः पुमान्। गुरुदेवद्विजातीनां पूजनं न समाचरेत्।।*' असे शास्त्रवचन आहे. माणसाच्या वासापासून देव दूर जातात त्या दुर्गंधाच्या निवारणासाठी '*येभ्यो माता*' आणि '*एवा पित्रो*' या मंत्रांचा उच्चार करावा. अर्भवाख्यानांत (ऐतरेय ब्राह्मण ३:३:६) मनुष्यगंधाला उबगून देवता अंतर्धान पावल्याचे सांगितले आहे. १२६. पूजेची सर्व सामग्री जमवून देवासमोर बसावे. देवाच्या उजव्या बाजूला पाण्याने भरलेला कलश ठेवावा. मग शंखाची पूजा करून त्यातील पाणी, पूजेची जागा, आपण स्वतः आणि पूजाद्रव्यांवर प्रोक्षण करावे. नंतर भूमी आणि भूत यांची शुद्धी करून अंतर्मातृका आणि बहिर्मातृका यांनी न्यास करावेत.१२७-१२८. तसेच स्वतःच्या शरीरावर आणि देवाच्या मूर्तीवर पुरुषसूक्तमंत्रांनी अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या मंत्रांनी हात, तिसऱ्या व चौथ्या मंत्रांनी पाय, पाचव्या व सहाव्या मंत्रांनी मांड्या, सातव्या व आठव्या मंत्रांनी कटीचे दोन्ही भाग, नवव्या मंत्राने नाभी, दहाव्या मंत्राने हृदय, अकराव्याने कंठ, बाराव्या व तेराव्या मंत्रांनी बाहू, चौदाव्या मंत्राने मुख, पंधराव्याने डोळे आणि सोळाव्या मंत्राने शीर असे न्यास करावेत. मागे सांगितल्याप्रमाणे अंगांचे न्यास करताना डावीकडून क्रम ठेवावा.१२९.

**एवं भूत्वा सुरोऽर्घ्यादि-पात्राण्यप्पूरितानि च । संस्थाप्येशकलां हृत्स्थाम् आपादतलमस्तकम् ।।१३०।।**
**ध्यात्वाञ्जलौ सुमगतां विभाव्यार्चागतां ततः । प्रकल्प्यार्चां देवरूपां साक्षान्मत्वा ततोऽर्चयेत् ।।१३१।।**
**सम्पूज्य पीठद्वाराशा मन्त्रतन्त्रविधानतः । पुंमन्त्रैर्वाह्वानपीठ-पाद्यार्घ्याचमनाप्लवान् ।।१३२।।**
**वस्त्रे सूत्रे गन्धपुष्पे धूपदीपाशनादिकम् । नतिप्रदक्षिणापुष्पाञ्जलीन्भक्त्याऽर्पयेत्क्रमात् ।।१३३।।**

एवं सुरः भूत्वा अप्+पूरितानि अर्घ्यादि पात्राणि च संस्थाप्य हृत्+स्थां आपाद+तल+मस्तकं ध्यात्वा अञ्जलौ सुमगतं विभाव्य ततः अर्चा+गतं प्रकल्प्य अर्चां साक्षात् देवरूपं मत्वा ततः अर्चयेत्।१३०-१३१। मन्त्र+तन्त्र+विधानतः पीठ+द्वार आशा सम्पूज्य पुं+मन्त्रैः आह्वान+पीठ+पाद्य+अर्घ्य+आचमन+आप्लवान्।१३२। वस्त्रे, सूत्रे, गन्ध+पुष्पे धूप+दीप+अशन+आदिकं नति+प्रदक्षिणा+पुष्पाञ्जलीन् भक्त्या क्रमात् अर्पयेत्।१३३।

आह्निककारिकेच्या '*देवो भूत्वा यजेद्देवम्*' या वचनानुसार या न्यासांनी देवरूप होऊन पाण्याने भरलेली पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान यांची भांडी आपापल्या जागी ठेवावी. हृदयस्थ ईश्वरकला (जीवात्मा) हीच गुरूपदिष्ट मूर्ती असे जाणून ती आपादमस्तक ध्यानात आणावी. तीच श्वासमार्गाने ओंजळीतील घेतलेल्या पुष्पांत गेली अशी भावना करावी. नंतर तीच फुले देवाला वाहून त्या फुलांतून ती देवाच्या मूर्तीत संक्रमित झाली अशी भावना करावी. मग ती मूर्ती साक्षात् देवतारूप असे मानून पूजा करावी.१३०-१३१. मंत्र आणि तंत्रविधानानुसार पीठद्वार आणि दिशा यांच्यासहित प्रतिमेचे पूजन करावे. किंवा पुरुषसूक्ताच्या मंत्रांनी क्रमशः आवाहन (*सहस्र..*), आसन (*पुरुष..*), अर्घ्य (*त्रिपादू..*), आचमन (*तस्माद्वि..*), स्नान (*यत्पुरुष..*), वस्त्रे (*तं यज्ञं..*), यज्ञोपवीत (*तस्माद्य..*), गंध (*तस्माद्य..*), पुष्पे (*तस्मादश्वा..*), धूप (*यत्पुरु..*), दीप (*ब्राह्मणो..*), नैवेद्य (*चंद्रमा..*), नमस्कार (*नाभ्या आ..*), प्रदक्षिणा (*सप्तास्या..*) आणि पुष्पांजली (*यज्ञेन..*) हे सोळा उपचार भक्तिपूर्वक समर्पण करावेत.१३२-१३३.

**(क्षेपकः) यजेत्पौराणिकैर्मन्त्रैः स्त्रीः शूद्रश्च द्विजोदितैः ।**
**संभवे सत्याप्लवादौ दद्यात्पञ्चामृतानि च । भूषाः सुभोगा गन्धोर्ध्वमशनेऽन्नं चतुर्विधम् ।।१३४।।**
**राजोपचारताम्बूल-दक्षिणारार्तिकैः फलैः । स्तोत्रैर्गीतैर्नृत्यवाद्यैस्तोषयेद् द्विजभोजनैः ।।१३५।।**
**घण्टानादं चरेदादौ स्नाने धूपप्रदीपयोः । दद्यादाचमनं स्नाने नैवेद्ये वस्त्रसूत्रयोः ।।१३६।।**
**जलं प्रत्युपचारं च शङ्खांब्वीशं विनाप्लुतौ । स्वारामारण्यक्रयाप्तं पुष्पं सन्मध्यमं त्वसत् ।।१३७।।**
**तद्वच्छ्वेतारक्तकृष्णं वर्ज्यं पर्युषितं सुमम् । सच्छिद्रं जन्तुयुक् शीर्णं कीटाद्यात्तं स्वयं च्युतम् ।।१३८।।**

स्त्रीः शूद्रः च द्विज+उदितैः पौराणिकैः मन्त्रैः यजेत्।क्षेपकः। संभवे सति, आप्लव आदौ पञ्चामृतानी, गन्ध+ऊर्ध्वं भूषा, सुभोगाः, अशने चतुर्विध अन्नं च दद्यात्।१३४। राज+उपचार+ताम्बूल+दक्षिणा+आरार्तिकैः फलैः स्तोत्रैः गीतैः नृत्य+वाद्यैः द्विज+भोजनैः तोषयेत्।१३५। स्नाने, धूप+प्रदीपयोः आदौ घण्टानादं चरेत्। स्नाने, नैवेद्ये, वस्त्र+सूत्रयोः आचमनं दद्यात्।१३६। प्रति+उपचारं जलं, ईशं विना आप्लुतौ शङ्ख +अम्बु (दद्यात्)। स्व+आराम+अरण्य+क्रय+आप्तं पुष्पं सन्, मध्यमं तु असत्।१३७। तत्+वत् श्वेत+आरक्त+कृष्णं (पुष्पम्)। पर्युषितं सच्छिद्रं, जन्तुयुक्, शीर्णं, कीट+आदि+आत्तं स्वयं च्युतं सुमं वर्ज्यम्।१३८।

भक्तिमान् स्त्रिया आणि शूद्रांनी ब्राह्मण पुरोहिताने सांगितलेल्या पौराणिक मंत्रांनीच पूजा करावी; वैदिक मंत्रांनी करू नये (क्षेपक). शक्य झाल्यास अभिषेकापूर्वी पंचामृतस्नान, गंधानंतर अलंकार, चांगले भोग, नैवेद्यांत चतुर्विध अन्न हे उपचारही अर्पण करावे.१३४. पूजेच्या आरंभी, स्नानाच्या वेळी, धूप आणि दीप दाखविताना घंटानाद करावा. तसेच स्नान, नैवेद्य, वस्त्रे आणि यज्ञोपवीत अर्पणानंतर आचमन द्यावे.१३५. राजोपचार, तांबूल, दक्षिणा, आरती, फळे, स्तोत्रपठण, गायन, नृत्य, वाद्य तसेच ब्राह्मणभोजनाने देवाला तुष्टवावे.१३६. प्रत्येक उपचारानंतर पाणी द्यावे. शिव सोडून इतर देवांना अभिषेकानंतर शंखोदक द्यावे. फले स्वतःच्या बागेतील उत्तम, अरण्यातील मध्यम आणि विकतची कनिष्ठ जाणावीत.१३७. त्याचप्रमाणे श्वेत पुष्प उत्तम, लाल मध्यम आणि काळे वाईट जाणावे. शिळी, भोके पडलेली, जन्तुयुक्त, फाटकी, किडे वगैरेनी खाल्लेली, आपोआप पडलेली फुले देवाला वर्ज्य आहेत.१३८.

**समलं वामहस्ताङ्घ्रि-स्पृष्टं क्षालितमम्बुनि । बकुलाब्जाशोकजाती-दूर्वाबिल्वं शमी कुशः ।।१३९।।**
**तुलसी करवीरं च मल्लिकाशोकमुत्तमम् । कोविदारार्कधत्तूर-शाल्मलीकुटजैर्हरिः ।।१४०।।**
**नार्च्यो गणेशस्तुलस्या दूर्वयार्येश्वरोऽसितैः । रक्तैः केतकनिम्बाद्यैर् बिल्वं श्वेतसुमं प्रियम् ।।१४१।।**
**दूर्वा गणेशस्य विष्णोस् तुलसीत्यादि सर्वशः । ज्ञात्वा पुष्पाणि देयानि श्रद्धया देवतुष्टये ।।१४२।।**
**हुत्वा पुंसूक्तेन दत्वा पुष्पाणि प्रार्थयेद्धरिः । मन्त्रं जपेद्यथाशक्ति भक्त्या तद्गतहृद्द्विजः ।।१४३।।**

समलं, वाम+हस्त+अङ्घ्रि+स्पृष्टं, अम्बुनि क्षालितं (पुष्पं वर्ज्यम्)। बकुल, अब्ज, अशोक, जाती, दूर्वा, बिल्वं, शमी, कुशः, तुलसी, करवीरं च मल्लिका, अशोकं उत्तमम्। कोविदार, अर्क धत्तूर, शाल्मली, कुटजैः हरिः न अर्च्यः।१३९-१४०। गणेशः तुलस्या, आर्या दूर्वया, ईश्वरः असितैः रक्तैः केतक-निम्बाद्यैः न अर्चयेत्। बिल्वं श्वेतसुमं प्रियम्।१४१। गणेशस्य दूर्वा, विष्णोः तुलसी इत्यादि सर्वशः पुष्पाणि ज्ञात्वा श्रद्धया देवतुष्टये देयानि।१४२। पुंसूक्तेन हुत्वा, पुष्पाणि दत्वा हरिः प्रार्थयेत्। द्विजः भक्त्या तद्+गत+हृत् यथाशक्ति मन्त्रं जपेत्।१४३।

मळ चिकटलेले, डाव्या हाताचा किंवा पायाचा स्पर्श झालेले पाण्यात धुतलेले फूलही वर्ज्य आहे. बकुळी, कमळ, अशोक, चमेली, दूर्वा, बेलपत्र, शमीपत्र, कुश,(१३९) तुळस, कण्हेर, मोगरा, अशोक ही उत्तम फुले होत. कांचन, रुई, धोतरा, सेमल, कुडा ही फले विष्णूला वाहू नयेत.१४०. गणपतीला तुळस, देवीला दूर्वा आणि शिवाला काळी व लाल फुले, तसेच केवडा, निम्ब इत्यादि फुले वाहू नयेत. शंकराला बिल्वपत्र आणि पांढरी फुले प्रिय आहेत.१४१. गणपतीला दूर्वा, विष्णूला तुळस इत्यादि सर्व फुले जाणून देवाला संतुष्ट करण्यासाठी श्रद्धापूर्वक अर्पण करावीत.१४२. नैवेद्यानंतर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेने चरु किंवा तूप यांची आहुती द्यावी त्याच मंत्रांनी देवाला फुले वाहावीत आणि हरीची सूक्ताने किंवा स्तोत्राने प्रार्थना करावी. नंतर त्रैवर्णिकांनी एकचित्ताने भक्तीने यथाशक्ती गुरूंनी उपदेशिलेल्या मंत्राचा जप करावा. शूद्रांनी ब्राह्मणाने सांगितलेल्या पौराणिक मंत्रानीच पूजा करावी. नामसंकीर्तन, स्मरण आणि श्रवण यांचा सर्वांनाच अधिकार आहे.१४३.

**द्विजदेवाङ्घ्र्यब्जतीर्थं पेयं धार्यं च मूर्धनि । चतुर्धाध्ययनं कुर्यात्स्ववृत्त्या पोष्यपोषणम् ।।१४४।।**
**स्ववृत्त्या जीवनाभावाद् गुर्वापद्यन्यवार्तया । जीवेतानिन्द्यया नैव हीनवृत्त्या कुटुम्ब्यपि ।।१४५।।**

द्विज+देव+अङ्घ्रि+अब्ज+तीर्थं पेयं मूर्धनि च धार्यम्। चतुर्धा अध्ययनं कुर्यात्। स्व+वृत्त्या पोष्यपोषणं (कुर्यात्)।१४४। स्ववृत्त्या जीवन+अभावात् गुरु+आपदि अनिन्द्यया अन्यवार्तया जीवेत। कुटुम्बी अपि हीनवृत्त्या न (जीवेत)।१४५।

प्रथम ब्राह्मणाचे व नंतर देवाचे चरणतीर्थ घेऊन मस्तकावर शिंपडावे. अध्ययन, अध्यापन, त्याच्या अर्थाचे चिंतन आणि प्रवचन असे चार प्रकारचे अध्ययन करावे. आपल्या वर्णानुसार विहित असलेल्या वृत्तीने अग्नी, गाय, अतिथी, आईवडील, पुत्र, भार्या इत्यादि पोष्यांचे पोषण करावे.१४४.

आपल्या विहित वृत्तीने उपजीविका होत नसेल तर दुसऱ्या चांगल्या वृत्तीचा अवलंब करावा. गृहस्थानेसुद्धा हीनवृत्तीचा आश्रय करू नये. ब्राह्मणाची मुख्य वृत्ती प्रतिग्रह (दान घेणे) आहे. ती अशक्य असल्यास अध्यापन आणि याजन (भिक्षुक, पौरोहित्य) किंवा अयाचित, यायावर, शिल आणि उञ्छ या वृत्ती शास्त्रसंमत आहेत. यायावर म्हणजे रोजच्या रोज धान्याची भिक्षा मागणे, कुसूल म्हणजे बारा दिवसांपर्यंतचा संग्रह करणे. कुम्भि म्हणजे सहा दिवसांचा संग्रह करणे. तीन दिवसांचा संग्रह किंवा निदान उद्याचा तरी संग्रह कलियुगांत करावा असे याज्ञवल्क्यस्मृतीत सांगितले आहे (*कुसूलकुम्भिधान्यो वा त्र्याहिकः श्वस्तनोऽपि वा। कलौ द्विजो न हि भवेदश्ववृत्तिः कथंचन।।*). यांपैकी कोणतीच उपजीविका शक्य नसेल तर क्षात्रवृत्तीने किंवा वैश्यवृत्तीने कुटुम्बाचे पोषण करावे. वृद्ध मातापिता, साध्वी भार्या, शिशु पुत्र यांच्या भरणपोषणसाठी करू नये तेही शंभर वेळा करावे असे मनूचे मत आहे (*वृद्धौ मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत्।।*) विविध स्मृतींतून यावर सविस्तर उहापोह केलेला आहे.१४५.

**कृतसन्ध्यः कृतोपस्थो जानुस्थसकुशाञ्जलिः । सोङ्कारव्याहृतिं देवीं रोदसीदत्तदृग्जपेत् ।।१४६।।**
**तां पच्छोऽर्धर्चशः सर्वां वेदान्साङ्गान्स्वशक्तितः । तिष्ठन्नासीनो व्रजन्वानध्यायेऽल्पं जपेत्ततः ।।१४७।।**
**त्रिर्नमो ब्रह्मण इति तर्पयेत्साक्षताञ्जलिः । देवानृषीन् तिलैः पितॄन् स्वगृह्योक्तविधानतः ।।१४८।।**
**यज्ञादिवर्ज्यमाशौचे कर्म मानसिकं चरेत् । यमाग्निपितृभे नन्दा शुक्रार्काहे जनुर्दिने ।।१४९।।**

कृत+सन्ध्यः कृत+उपस्थः जानुस्थ+सकुश+अञ्जलिः स+ओङ्कार+व्याहृतिं पत्+शः अर्ध+ऋचशः सर्वां देवीं रोदसी+दत्त+दृक् जपेत्।१४६। स+अङ्गान् वेदान् स्वशक्तितः तिष्ठन् आसीनः व्रजन् वा, अनध्याये अल्पं, 'त्रिः नमो ब्रह्मणे' इति जपेत्।१४७। स+अक्षत+अञ्जलिः देवान् ऋषीन्, तिलैः पितन् (च) स्व+गृह्य+उक्त+विधानैः तर्पयेत्।१४८। आशौचे यज्ञा+आदि+वर्ज्यं कर्म मानसिकं चरेत्। यम+अग्नि+पितृ+भे नन्दा शुक्र+अर्क+अहे जनुः+दिने,।१४९।

**ब्रह्मयज्ञ -** माध्याह्न संध्या आणि उपस्थान करून डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून ओंजळीत दर्भ घेऊन ती उजव्या गुडघ्यावर ठेवून ॐकार व व्याहृतींसह गायत्रीचा पदशः, अर्धा-अर्धा आणि पूर्ण जप करावा. या वेळी दृष्टी आकाश आणि पृथ्वी यांच्या संधीवर (क्षितिजावर) स्थिर केलेली असावी. यात आश्वलायनसूत्रांत वेगळे विधान सांगितले आहे. उपकर्मात पाण्याच्या कलशांत दर्भ ठेवून ब्रह्माञ्जली करावी असे विधान आहे. स्वशक्त्यनुसार, उठता-बसता किंवा चालताना सर्व वेदांचा पाठ करावा. ज्या दिवशी अनध्याय असेल तेव्हा थोडाच पाठ करावा. मग 'नमो ब्रह्मणे' या मंत्राचे तीन पाठ करावे.१४६-१४७. **पितृतर्पण -** मग आपापल्या गृह्यांत सांगितलेल्या विधानानुसार देव आणि ऋषी यांचे अक्षतांनी आणि पितरांचे तिळांनी तर्पण करावे.१४८. अशौच आले असता यज्ञादि कर्म वर्ज्य आहे. संध्या मानसिक करावी. भरणी (**यम**), कृत्तिका (**अग्नी**) आणि मघा (**पितृ**) या नक्षत्रांना, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या (**नंदा**) तिथींना, आपल्या जन्मदिवशी,(१४९)

**माङ्गल्येऽब्दतदर्धार्धं विवाहव्रतचौलतः । तिलैर्नैमित्तिकमृते तर्पयेन्न गृहे तु न ।।१५०।।**
**भीष्मं माघसिताष्टम्यां दीपाल्यां तर्पयेद्यमम् । नित्यैर्नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत् ।।१५१।।**
**त्रियज्ञाढ्यं वैश्वदेवं कुर्यात्सूनापनुत्तये । ध्याते कुण्डस्थापितेऽग्नौ दीप्तेऽन्नाद्याहुतीर्हुनेत् ।।१५२।।**

माङ्गल्ये विवाह+व्रत+चौलतः अब्द+तत्+अर्ध+अर्धं नैमित्तिकं ऋते तिलैः न तर्पयेत्। गृहे तु (तिलैः) न।१५०। माघ+सित+अष्टम्यां भीष्मं, दीपाल्यां यमं तर्पयेत्। नित्यैः नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत्।१५१। सूना+अपनुत्तये त्रि+यज्ञ+आढ्यं वैश्वदेवं कुर्यात्। कुण्डे स्थापिते ध्याते अग्नौ अन्नादि आहुतीः हुनेत्।१५२।

मंगलकार्यानंतर, विवाहानंतर एक वर्ष, मुंजीनंतर सहा महिने आणि चौलानंतर तीन महिने तिळांनी तर्पण करू नये. नैमित्तिक तिलतर्पणाला दोष नाही. घरी तिलतर्पण करू नये.१५०. माघ शुद्ध अष्टमीला '*वैयाघ्रपादगोत्राय सांकृत्यप्रवराय च। अपुत्राय ददाम्येतज्जलं भीष्माय तर्पणे*' या मंत्राने भीष्माचे आणि यम, धर्मराज, मृत्यू, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र आणि चित्रगुप्त या नावांनी यमाचे तर्पण करावे. निर्णयसिंधूप्रमाणे ज्याचा पिता जिवंत आहे त्यानीसुद्धा भीष्म आणि यम यांचे तर्पण करावे. अमावास्यादि शहाण्णव नित्य श्राद्धे आणि गयादि तीर्थाला जाऊन केलेल्या नैमित्तिक श्राद्धांच्या अनुष्ठानानेच पुत्राचे पुत्रत्व सार्थ होते. जिवंत असतांना आज्ञा पाळण्याने आणि मृत्यूनंतर दर वर्षी अन्नदानाने आणि गयेला जाऊन पिंडदान यांनीच पुत्राची पुत्र ही संज्ञा सार्थ ठरते (*जीवितो वाक्यकरणात्प्रत्यब्दं भूरिभोजनात्। गयायां पिण्डदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता।।*).१५१.

**वैश्वदेव -** पराशरस्मृतीनुसार उखळ, मुसळ, चूल, रांजण आणि झाडू या पाच सूनांचा दोष गृहस्थाश्रमात लागतो. तो स्वर्गाला जाऊ देत नाही. त्याचा परिहार करून आत्मशुद्धी होण्यासाठी देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ ह्या तीन यज्ञांनी युक्त असा वैश्वदेव करावा. अग्नीत हवन केले जाते तो देवयज्ञ, बली दिला जातो तो भूतयज्ञ, पितरांना दिला जातो तो पितृयज्ञ, स्वाध्यायाचे अध्ययन हा ब्रह्मयज्ञ आणि मनुष्यांना दिला जाणारा मनुष्ययज्ञ अशी पाच महायज्ञाची लक्षणे आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितली आहेत (आश्वलायन गृह्यसूत्र ३:१:३). कुण्डात स्थापन केलेल्या अग्नीचे ध्यान करून त्यात अन्नदिकांच्या आहुती समर्पण कराव्यात.१५२.

**प्रातः सायं बलीन्दद्यात् पितृभ्योऽपि बहिर्बलिम् । भूताद्युद्देशतः क्षिप्त्वा काङ्क्षेदतिथिमागतम् ।।१५३।।**
**कमप्यभ्यर्च्य शक्त्यान्नं देयमीश्वरतुष्टये । साद्यान्ताम्ब्वन्नं यतौ तत् स्वल्पमप्यद्रिसिन्धुवत् ।।१५४।।**
**बलावनुद्धृते नाद्यान्नोद्धरेच्च स्वयं बलिम् । नित्यं श्राद्धं चरेद्वान्नं दद्यादद्याच्च पोष्ययुक् ।।१५५।।**
**मन्त्रवत्परिषिच्यार्द्र-हस्ताङ्घ्र्यास्योऽविदिङ्मुखः । दक्षभागे बलीन्दत्वाऽहं वैश्वानर इत्यमुम् ।।१५६।।**
**स्मृत्वापो मन्त्रवत्प्राश्य हुतप्राणाहुतीर्ग्रसेत् । धृतपात्रः प्राणमन्त्रैरजावद्भोजनं चरेत् ।।१५७।।**

प्रातः सायं पितृभ्यः बलीन् दद्यात्। भूतादि उद्देशतः अपि बहिः बलीन् क्षिप्त्वा अतिथिं काङ्क्षेत्।१५३। कं अपि आगतं अभ्यर्च्य ईश्वर+तुष्टये शक्त्या अन्नं दद्यात्। यतौ स+आद्य+अंत+अम्बु+अन्नं तत् स्वल्पं अपि अद्रि+सिन्धु+वत्।१५४। बलौ अनुद्धृते न अद्यात्, स्वयं च बलिं न उद्धरेत्। नित्यं श्राद्धं चरेत्, अन्नं वा दद्यात्। पोष्ययुक् अद्यात्।१५५। मन्त्रवत् परिषिच्य आर्द्र+हस्त+अङ्घ्रि+आस्यः अविदिक्+मुखः दक्षभागे बलीन् दत्वा 'अहं वैश्वानर' इति अमुं स्मृत्वा, मन्त्रवत् प्राश्य, प्राणमन्त्रैः हुत+प्राण+आहुतीः ग्रसेत्। धृतपात्रः अजावत् भोजनं चरेत्।१५६-१५७।

सकाळी व संध्याकाळी बलिहरण करावे. पितरांना बली देऊन भूतादिकांसाठी बाहेर बली टाकावा आणि अतिथीची वाट पाहावी.१५३. त्या समयी जो कोणी मनुष्य येईल त्याची पूजा करून देवाच्या संतोषासाठी त्याला शक्त्यनुसार अन्न द्यावे. भिक्षेला आलेल्या संन्याशाला आधी व नंतर पाण्यासह थोडेही अन्न दिले तर ते पर्वताएवढ्या अन्नाचे आणि समुद्राएवढ्या जलाचे फळ देऊन जाते. यति आणि ब्रह्मचारी हे शिजवलेल्या अन्नाचे धनी आहेत. त्यांना अन्न न देता जेवल्यास चांद्रायण आचरावे. '*यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ। तयोरन्नमदत्वा तु भुक्त्वा चान्द्रायणं चरेत्।।*' (पराशर स्मृति १:४६).१५४. बलिहरणावरील झाकण काढल्यावरच जेवावे. ते स्वतः काढू नये. नित्य श्राद्ध तरी करावे किंवा तन्निमित्त अन्न तरी द्यावे. मग पिता, पुत्र आदि पोष्यांसह भोजन करावे.१५५.

**पात्रधारणमौने तु प्राणाहुत्यूर्ध्वमैच्छिके । तैजसे राजते हैमे ताम्रे जम्ब्वाम्रचम्पके ।।१५८।।**
**रम्भामधूककुटज-पनसोदुम्बरच्छदे । भोक्तव्यं मण्डलोर्ध्वस्थे विधवाव्रतिभिक्षुभिः ।।१५९।।**
**न तैजसेऽखिलैर्वल्ली-पलाशार्कवटादिषु । पीठस्थोऽप्यासनारूढः प्रसृतप्रोष्ठपात्र तु ।।१६०।।**

पात्र+धारण+मौने तु प्राण+आहुति+ऊर्ध्वं ऐच्छिके। मण्डल+ऊर्ध्वस्थे तैजसे, राजते, हैमे, ताम्रे, जम्बु+आम्र+चम्पके रम्भा+मधूक+कुटज+पनस+उदुम्बर+छदे भोक्तव्यम्। विधवा+व्रति+ भिक्षुभिः न तैजसे। अखिलैः वल्ली+पलाश+अर्क+वट+आदिषु (न भोक्तव्यम्)। पीठस्थः आसन+आरूढः प्रसृत+प्रोष्ठ+पात् तु न (भोक्तव्यम्)। १५८-१६०।

**भोजनविधी -** भोजनविधी प्रथम, दिवसां '*सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामि*' आणि रात्री '*ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामि*' या मंत्रांनी अन्नाभोवती पाणी शिंपडावे. नंतर हात, पाय आणि मुख ओले असताना, आग्नेयादि कोणाकडे मुख न करता उजव्या बाजूला आपापल्या उपदेशानुसार '*चित्राय नमः*' इत्यादि मंत्रांनी बली घालावेत. '*अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तं पचाम्यन्नं चतुर्विधम्।।*' (भ.गीता १५:१४) या मंत्राचे अर्थपूर्वक स्मरण करावे. '*वैश्वानरः साधारणशब्दविशेषात्*' या ब्रह्मसूत्रानुसार (१:२:२४) प्रत्यगात्माच होय. त्याचे स्मरण करून, '*अमृतोऽपस्तरणमसि स्वाहा*' या मंत्राने पाणी प्यावे. मग छांदोग्य उपनिषदांत (१:३:३) वर्णन केलेल्या प्राण, अपान आणि व्यान यांच्या स्वरूपाचा विचार करून '*श्रद्धायां निविष्टोऽमृतं जुहोमि शिवोमाविशप्रदाहय*' इत्यादि पाच प्राणमंत्रांनी प्राणाहुती दाताला स्पर्श न होऊ देता गिळाव्यात. मग पात्र धरून ठेवून शेळीसारखे शीघ्र भोजन करावे. प्राणाहुतीपर्यंत पात्र धरून ठेवणे व मौन ही पाळलीच पाहिजेत. नंतर मात्र ती ऐच्छिक आहेत. मंडल (ब्राह्मणांनी चतुष्कोण) करून त्यावर भोजनपात्र ठेवावे. पात्र कांस्य, चांदी, सोने ह्या धातूचे किंवा जांबू, आंबा, चाफा, केळी, महू, कुडा, फणस किंवा औदुंबर यांच्या पत्रावळीवर जेवावे. विधवा, मुंजा आणि संन्यासी यांनी काशाच्या पात्रात जेवू नये. वेली, पळस, रुई, वड इत्यादींची पाने सर्वांनाच वर्ज्य आहेत. पीठावर बसून, स्वस्तिकादि आसन घालून, पाय पसरून किंवा आसनावर पाय ठेवून जेवू नये.१५८-१६०.

**नार्भैर्वध्वोद्वाहमृते नाद्याद्दुष्टैकपङ्क्तिगः । द्वार्भस्माग्न्यप्स्तम्भमार्गैर्-भिन्द्यात्पङ्क्तिं तु संशये ।।१६१।।**
**नाद्यात्पाकाग्निदेवासद्गृहे सन्ध्यातिरात्रिषु । पीतशेषं ग्रासशेषं रात्रिपर्युषितं विना ।।१६२।।**
**तैलाज्यपक्वं शूद्रान्नमुदक्यादिविलोकितम् । केशकीटादियुक्पक्वं व्याद्युच्छिष्टं सदा त्यजेत् ।।१६३।।**
**कुसुम्भालाबुवृन्ताक-कोविदारवटादिकम् । कुस्थानोत्थान्नशाकादि-पलाण्डुलशुनाद्यसत् ।।१६४।।**
**सद्गोलुलायीदुग्धादि सदन्यासां तु गर्हितम् । कांस्येऽसन्नारिकेलेक्षु-रसो गव्यं च ताम्रके ।।१६५।।**

न अर्भैः, उद्वाहम् ऋते वध्वा, न दुष्ट+पङ्क्ति+गः अद्यात्। संशये तु द्वाः+भस्म+अग्नि+स्तम्भ+मार्गैः पङ्क्तिं भिन्द्यात्।१६१। पाक+अग्नि+देव+असत्+गृहे न अद्यात्। सन्ध्या+अतिरात्रिषु (न अद्यात्) पीतशेषं, ग्रासशेषं, विना तैल+आज्य+पक्वं रात्रिपर्युषितं, शूद्रान्नं, उदक्यादि+विलोकितं, केश+कीट+आदि+युक्+पक्वं वि+आदि+उच्छिष्टं सदा त्यजेत्।१६२-१६३। कुसुम्भ+अलाबु+वृन्ताक+कोविदार+वट+आदिकं कुस्थान+उत्थ+शाकादि पलाण्डु+लशुनादि असत्।१६४। सत्+गो+लुलायी+दुग्ध+ आदि सत्। अन्यासां तु गर्हितम्। कांस्ये नारिकेल+इक्षु+रसः, ताम्रके गव्यं च असत्।१६५।

मुलांबरोबर एका पात्रात जेवू नये; तसेच पत्नीसहही, लग्नसमारंभाशिवाय एका ताटात जेवू नये. दोषी व्यक्तीच्या पंक्तीत जेवू नये. तसा संशय वाटल्यास दार, भस्म, अग्नी, खांब किंवा मार्ग यांनी पंगत तोडावी.१६१. स्वयंपाकघरात, अग्निशालेत, देवघरात आणि दुष्टघरी जेवू नये. संध्याकाळात, अपरात्री जेवू नये. पिऊन किंवा खाऊन उरलेले, तुपांत किंवा तेलांत तळलेले सोडून रात्रीचे शिळे अन्न, शूद्राचे अन्न, अस्पृश्य स्त्रीने पाहिलेले अन्न, केस, किडे इत्यादींसह शिजवले गेलेले, पक्षी वगैरेनी उष्टावलेले अन्न नेहमीच टाकून द्यावे.१६२-१६३. कुसुंब, भोपळा, वांगी, कांचन, वड इत्यादि, तसेच कुस्थानांत उपजवलेल्या भाज्या, कांदा, लसूण इत्यादि त्याज्य आहेत.१६४. चांगल्या, सवत्सा, चार सडांच्या गाईचे किंवा म्हशीचे दूध चांगले. इतरांचे - गाढवी, उंटीण, मेंढी इत्यादींचे त्याज्य आहे. नारळाचे पाणी आणि ऊसाचा रस काशाच्या भांड्यातून घेऊ नये. तसेच दूध तांब्याच्या पात्रात ठेवू नये.१६५.

**गुडः सदध्यार्द्रकोऽसन् केवलं लवणं त्वसत् । श्वोदक्यापतिताद्यारश्रवणे तद्विलोकने ।।१६६।।**
**भुक्तौ परस्परस्पर्शे नाद्यात्पङ्क्तिस्थ उत्थिते । गुरून्विनोलूखलादेर् नाद्याद्यावद्ध्वनि द्विज ।।१६७।।**
**नष्टे दीपे न भोक्तव्यं न मूत्राद्युत्सृतौ भुजिः । लेह्याद्यसद्धस्तदत्तं नोच्छिष्टं भाजने न्यसेत् ।।१६८।।**
**ग्रसेदास्याविकारेण ग्रासानष्टौ यतिर्वनी । षोडश द्वात्रिंशदन्यो वर्णीष्टं मधुरं द्रवम् ।।१६९।।**
**प्राङ्मध्येऽम्लादिकठिनं तिक्ताद्यन्ते द्रवं ह्यपि । सर्वं सशेषमश्नीयात् पायसाज्याब्धिजैर्विना ।।१७०।।**

स+दधि+आर्द्रकः गुडः असत्। केवलं लवणं असत्। श्व+उदक्या+पतित+आदि+आर+श्रवणे, तत्+विलोकने, भुक्तौ परस्पर+स्पर्शे, गुरून् विना पङ्क्तिस्थ उत्थिते, यावत् उलूखल+आदेः ध्वनि, न अद्यात्।१६६-१६७। नष्टे दीपे न भोक्तव्यम्। मूत्रादि उत्सृतौ भुजिः न। लेह्यादि हस्त+दत्तं असत्। उच्छिष्टं भाजने न न्यसेत्।१६८। यतिः आस्य+अविकारेण अष्टौ ग्रासान् ग्रसेत्। वनी षोडश, अन्यः द्वात्रिंशत्, वर्णी इष्टम्। प्राक् मधुरं द्रवं,।१६९। मध्ये अम्लादि कठिनं, अन्त्यं द्रवं (भोक्तव्यम्)। पायस+आज्य+अब्धिजैः विना सर्वं सशेषं अश्नीयात्।१७०।

दही किंवा आल्यात मिसळलेला गूळ त्याज्य आहे. नुसते मीठ खाऊ नये. कुत्रे, विटाळशी, पतित इत्यादींचा आवाज कानांवर पडला तर किंवा ते दृष्टीसमोर आल्यास, जेवताना एकमेकांना स्पर्श झाल्यास, गुरूंवाचून पंगतीतील एकही व्यक्ती उठल्यास जेवण सोडून उठावे. उखळ, मुसळ किंवा जाते यांचा आवाज होत असताना जेवण थांबवावे.१६६-१६७. जेवताना दिवा विझला तर जेवू नये. मलमूत्र उत्सर्ग झाल्यास जेवू नये. चटणी, श्रीखंड इत्यादि लेह्य पदार्थ हातांनी वाढले तर निषिद्ध आहेत. उष्टे ताटात ठेवू नये.१६८. तोंड वेडवाकडे न करता त्यात मावतील एवढेच घास घ्यावेत. संन्याशाने आठ घास घ्यावेत. वानप्रस्थाने सोळा आणि गृहस्थाने बत्तीस घास घ्यावेत. ब्रह्मचाऱ्याने हवे तितके जेवावे. सुरुवातीला गोड आणि पातळ पदार्थ खावेत,(१६९) मध्ये आंबट आणि कठीण पदार्थ आणि शेवटी कडसर, तुरट आणि पातळ पदार्थ खावेत. दूध, तूप आणि मीठ सोडून सर्व पदार्थ पानांत थोडे ठेवून खावेत.१७०.

**नाद्याद्व्रताऽहेर्कपर्व-नक्तं भूताष्टमी दिवा । तलप्रसृतशाखाभिर् भुक्तं फूत्कारतोऽप्यसत् ।।१७१।।**
**त्यक्त्वोच्छिष्टं क्षितौ मन्त्रात् पीतापोशनशेषकम्। कौ सिक्त्वा रौरव इति मन्त्राच्छुद्धकरास्यपात् ।।१७२।।**
**हस्तोद्धृष्टाम्बु सिक्त्वाक्ष्णोर्जपेच्छर्यातिमित्यपि । आतापिं चेति ताम्बूलं सत्पञ्चत्र्यैकपूगयुक् ।।१७३।।**
**साङ्गं प्राग्ब्रह्मणे दद्याादद्यान्नदोधवा यतिः । चूर्णाङ्घ्र्यग्रशिरोनं सत्पर्णं चाहोवशेषकम् ।।१७४।।**

व्रत+अहे अर्कपर्व+नक्तं, भूत+अष्टमी दिवा न अद्यात्। तल+प्रसृत+शाखभिः, फूत्कारतः अपि भुक्तं असत्। १७१। मन्त्रात् उच्छिष्टं क्षितौ त्यक्त्वा, पीत+आपोशन+शेषं 'रौरव' इति मन्त्रात् कौ सिक्त्वा, शुद्ध+कर+आस्य+पात् ।१७२। हस्त+उद्धृष्ट+अम्बु अक्ष्णोः क्षिप्त्वा, 'शर्यातिं' इति जपेत्। 'आतापिं' च इति अपि। ताम्बूलं पञ्च+त्रि+एक+पूग+युक् सत्।१७३। प्राक् स+अङ्गं ब्रह्मणे दद्यात्। अदः अधवा, यतिः न अद्यात्। पर्णं चूर्ण+अङ्घ्रि+शिरा+ऊनं सत्। अहः अवशेषकं...।१७४।

एकादशीच्या दिवशी, अमावास्येला रात्री तसेच अष्टमी आणि चतुर्दशीला दिवसा, जेवू नये. तळहाताने किंवा पसरलेल्या बोटांनी किंवा फुरके मारून जेवणे निषिद्ध आहे.१७१. '*यजमानकुले जाता*' या मंत्राने उच्छिष्ट भूमीवर टाकून, '*रौरवे पूयनिलये*' या मंत्राने आपोशनाचे शेष पाणी जमिनीवर टाकावे. नंतर हात, तोंड आणि पाय धुवून(१७२) '*शर्यातिं च सुकन्यां च च्यवनं शक्रमश्विनौ। भोजनान्ते स्मराम्येतान्यतश्चक्षुर्न हीयते।*' या मंत्राचा जप करीत दोन्ही हातांनी पाणी डोळ्यांवर शिंपावे. मग '*आतापिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्वाशेषं। सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छन्त्वरोगं मम चास्तु देहे।।*' हा मंत्र म्हणत पोटावर हात फिरवावा.१७३. पाच, तीन किंवा एका सुपारीचा विडा ग्राह्य आहे. त्रयोदशगुणी विडा आपण घेण्यापूर्वी ब्राह्मणाला द्यावा. विधवा आणि संन्यासी यांनी विडा खाऊ नये. विड्यासाठी नागवेलीचे पान न चुरलेले, देठ आणि शिरा काढलेले असावे. दिवसाचा उरलेला 'भाग' पुढच्या श्लोकाशी संबंधित आहे.१७४.

**नयेत्पुराणमननात् ततो नक्तं कृतक्रियः । स्वपेद्यामोर्ध्वं द्वियामं विष्णवर्पितसमक्रियः ।।१७५।।**
**सुमुहूर्तकृते तल्पे स्तुवन्निट्सुखशाय्यहीन् । त्रिसन्ध्ये न स्वपेद्भूत्यां धान्येऽह्न्यमरगोगृहे ।।१७६।।**
**न श्मशानाध्ववल्मीक-घोरदेश उदक्शिराः । नग्नो नोर्ध्वं देवगुर्वोः प्रवासे प्राक्पदः स्वपेत् ।।१७७।।**
**कार्या निशाद्ययामान्तं सङ्कटान्तरिता क्रिया । नैशा निशीथपर्यंतं प्रायश्चित्तं ततः परम् ।।१७८।।**

अहः अवशेषकं पुराण+मननात् नयेत्। ततः कृत+क्रियः नक्तः विष्णु+अर्पित+सम+क्रियः याम+ऊर्ध्वं द्वि+यामं स्वपेत्।१७५। सु+मुहूर्त+कृते तल्पे निट्+सुखशायी+अहीन् स्तुवन् (स्वपेत)। त्रि+सन्ध्ये, भूत्यां, धान्ये, अह्नि अमर+गो+गृहे,।१७६। श्मशान+अध्व+ वल्मीक+घोरदेशे उदक्+शिराः, नग्नः, देव+गुरोः ऊर्ध्वं न (स्वपेत)। प्रवासे प्राक्+पदः स्वपेत्।१७७। सङ्कट+अन्तरिता क्रिया निशा+आद्य+याम+अन्तं कार्या। नैशा निशीथ+पर्यन्तम्। ततः परं प्रायश्चित्तम्।१७८।

उरलेला दिवस पुराणाच्या चिंतनात घालवावा. नंतर रात्रीची संध्या आणि पूजा करून दिवसभराची सर्व कर्मे विष्णूला अर्पण करावीत. भगवदुक्तीला अनुसरून आपण जे जे करतो, जे खातो, हवन करतो, दान करतो, तप करतो ते सर्व भगवंताला अर्पण करावे (*यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुषव मदर्पणम्।।* भ.गीता ९:२७). एक प्रहर रात्रीनंतर मधले दोन प्रहर झोप घ्यावी (म्हणजे सूर्योदयापूर्वी एक प्रहर उठावे).१७५. झोपेसाठी चांगल्या मुहूर्तावर केलेली खाट (पलंग) असावी. रात्र, सुखशायी (*अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः। कपिलो मुनिरास्तीकः पञ्चैते सुखायिनः।।*) आणि सर्पांची (*यो जरत्कारुणो जातो..*) स्तुती करून निजावे. सकाळ, माध्याह्न आणि सायंकाळ ह्या तीन संध्याकाळात झोपू नये. राखेवर, धान्यावर, दिवसा, देवघरात, गोठ्यात,(१७६) श्मशानात, मार्गावर, वारुळाजवळ, भयाण जागी, उत्तरेला डोके करून, नागव्याने किंवा देव आणि वडिलांपेक्षा उंच जागेवर झोपू नये. प्रवासांत पूर्वेला पाय करून झोपावे.१७७. संकटामुळे न घडलेली दिवसाची विहित कर्मे रात्रीच्या पहिला प्रहर संपण्यापूर्वी करावीत. रात्रीची विहित कर्मे मध्यरात्रीपूर्वी करावीत. त्यानंतरही न घडल्यास प्रायश्चित्त घ्यावे.१७८.

**कर्मवैगुण्यादिदोषे लोपादावपि सर्वशः । प्रायश्चित्तं चरेद्विद्वान् यथावन्नान्यथा शुचिः ।।१७९।।**
**स्वर्क्षे स्वजायामृतूर्ध्वं शुद्धामुपगमेद्रहः । प्राक्चतुर्निट्श्राद्धतत्प्राग् दिनाहोव्रतपर्वसु ।।१८०।।**
**जन्माहाद्यष्टमीभूत-मूलान्त्यपितृभेषु नो । कैश्चिदुक्तं दशाब्दोर्ध्वं वर्णी स्यादृतुगः सदा ।।१८१।।**
**द्वेषादिनोपगच्छेद्यो नर्तौ स भ्रूणहाप्यृतौ । यो विदेशं व्रजेद्वन्ध्यां कन्यापुत्रान्वितामृते ।।१८२।।**

कर्म+वैगुण्य+आदि दोषे, लोपादौ अपि सर्वशः, विद्वान् यथावत् प्रायश्चित्तं चरेत्। अन्यथा शुचिः न।१७९। सु+अर्क्षे स्व+जायां शुद्धां रहः उपगमेत्। प्राक् चतुः+निट् श्राद्ध+तत्+प्राक्+दिन+अहो+व्रत+पर्वसु,।१८०। जन्म+अह+आदि+अष्टमी+भूत+मूल+पितृ+भेषु नो। कैश्चित् दश+अब्द+ऊर्ध्वं उक्तम्। सदा ऋतुगः वर्णी स्यात्।१८१। द्वेष+आदिना यो ऋतौ न उपगच्छेत स भ्रूणहा। यो ऋतौ, कन्या+पुत्र+अन्विता ऋते, विदेशं व्रजेत् अपि (भ्रूणहा)।१८२।

कर्म यथासांग न घडणे इत्यादि दोषांसाठी किंवा कर्माचा लोप झाला असता जाणीवपूर्वक शास्त्रानुसार योग्य ते प्रायश्चित्त घ्यावे. अन्यथा तो शुद्ध होत नाही.१७९. शुभ नक्षत्री, ऋतुकालानंतर शुद्ध झालेल्या स्वपत्नीसह एकांतात संभोग करावा. हे संभोगाला प्रवृत्त करणारे विधान नाही तर संभोगाला मर्यादा घालणारी परिसंख्या आहे. संभोग केलाच पाहिजे असे नाही. तर संभोग केलाच तर तो कुणाशी, कधी, कुठे करावा याचे नियमन आहे. ऋतुकालातील पहिल्या चार रात्री, श्राद्ध व त्याआधीचा दिवस, दिवसा, व्रतदिनी, पर्वकाळी,(१८०) जन्मादि तिथीदिवशी, अष्टमी, चतुर्दशी, मूळ, रेवती, मघा या नक्षत्रात संभोग वर्ज्य आहे. दहा वर्षांनंतर कन्येला रजस्वलत्व येते असे कांहीचे म्हणणे आहे. त्यापूर्वीच तिचा विवाह करावा. वरील नियम पाळून ऋतुकाळातच स्त्रीसंग करणारा गृहस्थही ब्रह्मचारी होतो.१८१. द्वेषादिकांमुळे जो ऋतुकाळात भार्येशी संग करीत नाही त्याला भ्रूणहत्येचे पाप लागते. तसेच ऋतुकाळात दूरदेशी जाणाऱ्यालाही भ्रूणहत्येचा दोष सांगितला आहे. पत्नीला मुले-मुली असतील किंवा ती वंध्या असेल तर हा दोष नाही.१८२.

**षोडशाहमृतुः कन्याऽसमेऽत्राह्नि समे सुतः । भवेन्निषेकसमये यादृक्चित्तविकल्पना ।।१८३।।**
**भ्रूणस्तद्वदतस्ताभ्यां सत्त्वं धार्यं हिताप्तये । पितृत्राता हि सत्पुत्रः प्रायोऽपुत्राः पतन्त्यधः ।।१८४।।**
**पितृतारक एकोऽपि सत्पुत्रोत्र ध्रुवादिवत् । किं कार्यं बहुभिर्दुष्टैर् धार्तराष्ट्रशतोपमैः ।।१८५।।**
**तारकोऽत्रैवमाचारः प्रोक्तः शाक्त्यादिसंमतः । विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भव ।।१८६।।**
**उभयीसिद्धिभाजस्ते य आचारं चरन्त्यमुम् । स्वाचारहीना दण्ड्याः स्युर् ब्राह्मणास्तु विशेषतः ।।१८७।।**

षोडश+अहं ऋतुः। अत्र असमे कन्या, समे सुतः। निषेक+समये यादृक् चित्त+विकल्पना भवेत्,।१८३। तत्+वत् भ्रूणः। अतः ताभ्यां हित+आप्तये सत्त्वं धार्यम्। प्रायः अपुत्राः अधः पतन्ति।१८४। अत्र ध्रुव+आदि+वत् एकः अपि सत्पुत्रः पितृतारकः। बहुभिः धार्तराष्ट्र+शत+उपमैः दुष्टैः किं कार्यम्?१८५। अत्र प्रोक्तः शाक्त्य+आदि+संमतः आचारः एव तारकः। विचार+आचारं आदाय कर्म कुर्वन् सुखी भव।१८६। ये अमुं आचारः चरन्ति ते उभयी+सिद्धि+भाजः। स्व+आचार+हीनाः दण्ड्याः स्युः। ब्राह्मणाः तु विशेषतः।१८७।

रजोदर्शनानंतर सोळा दिवसांचा ऋतुकाल असतो. त्यात विषम दिवशी कन्या व सम दिवशी पुत्र होतात. संभोगसमयी मनाची जशी चांगली-वाईट अवस्था असते तसेच मूल होते. यासाठी दंपतीनी मैथुनाच्या काळी चांगली संतती होण्यासाठी सत्त्ववृत्ती धारण करावी. बहुतेक पुत्रहीन अधोगतीला जातात.१८४. मनुष्यलोकात ध्रुवादिकांप्रमाणे एकसुद्धा सत्पुत्र पित्याला तारून नेतो. धृतराष्ट्राच्या शंभर मुलांसारखे दुष्ट पुत्र काय कामाचे?१८५. इथे निरूपिलेला पराशरादि मुनींनी पुरस्कारलेला आचारच तारक आहे. अनाचार हा मालिन्याला कारण आहे आणि अति आचार मूर्खपणाचा ठरू शकतो (*अनाचारस्तु मालिन्यमत्याचारस्तु मूर्खता। विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भवेत्।।*) ह्या स्मृतीच्या मार्गदर्शनानुसार विचारपूर्ण आचार करून कर्म करावे आणि सुखी व्हावे.१८६. जे हा आचारधर्म पाळतात ते ऐहिक आणि आमुष्मिक सिद्धी पावतात. आपला आचार सोडणारे, विशेषतः ब्राह्मण, शिक्षेला पात्र आहेत.१८७.

**इति गुरुमुखलब्धं धर्ममेनं चरन्स । द्विज इह सुखमिष्टं साधु भुक्त्वाऽप मोक्षम् ।**
**तत उदित इहासौ तिष्यलुप्तोऽपि धर्मो । विभुरपि लघुसिद्ध्यै भक्तियोगं ततान ।।१८८।।**

**।। इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मकाण्डकथनं नाम अष्टमोध्यायः ।।**

**।। आदितोऽष्टादशोऽध्यायः ।।**

इति गुरु+मुख+लब्धं एनं धर्मं चरन् सः द्विजः इष्टं साधु सुखं भक्त्वा मोक्षं आप। ततः असौ तिष्य+लुप्तः अपि धर्मः इह उदितः। विभुः अपि लघु+सिद्ध्यै भक्तियोगं ततान।१८८।

साक्षात् श्रीगुरूंच्या मुखातून लाभलेल्या ह्या धर्माचे आचरण करून तो ब्राह्मण ह्या जन्मात अभीष्ट आणि धर्म्य अशा सुखाचा उपभोग घेऊन अंती मोक्ष पावला. कलिकाळांत लुप्तप्राय झालेला हा धर्म तेव्हापासून प्रकट झाला. अशा रीतीने क्रिया, कारक, फल आदिरूप प्रपञ्च ज्या निष्प्रपंच आत्म्यावर भासतो त्या आत्म्याचे यथार्थ रूप दर्शविण्यासाठी अधिकारानुसार चित्तशुद्धीसाठी ह्या कर्मकाण्डाची रचना झाली. त्यानंतर कलियुगांत लवकर सिद्धीला जाणारा भक्तियोग मांडला आहे.१८८.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा कर्मकांडाचा पाचवा आणि आधीपासून अठरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुदेव दत्त।**

# ।। एकोनविंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**कर्मयोगं ज्ञानयोग-सहायं चित्तशोधनम् । उक्त्वापि भगवान्कस्माद् भक्तियोगं जगौ वद ।।१।।**

नामधारक उवाच। ज्ञान+योग+सहायं चित्त+शोधनं कर्म+योगं उक्त्वा अपि भगवान् भक्ति+योगं कस्मात् जगौ? वद।१।

श्रीगणेशाय नमः। *पांच अध्यायांत श्रीगुरु नित्यकर्म उपदेशिती। जेणेचि पाविजे द्विजांनी योग्यता आणि चित्तशुद्धि ।। श्रद्धा-भक्ति-ध्यानयोगे ज्ञान उपजे सांगे श्रुति।* (कैवल्य उपनिषत् २) *जयांचे चित्त शुद्ध तयांलागीं ध्यानासाठी भक्ति सांगती।। वंध्येच्या कुशीं पुत्रजन्म तशी शुष्क काष्ठा पालवी। दावुनि द्विजाचे कुष्ठ नासती एकोणिसाव्या अध्यायी।* नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, चित्तशुद्धीद्वारा ज्ञानयोगाला साह्यभूत असणारा कर्मयोग श्रीगुरूंनी सांगितला. मागच्या अध्यायात ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाची प्राप्ती करून देणाऱ्या आचारधर्माचे सार सांगून तो कसा मोक्षपर्यवसायी आहे तेही दाखविले. आता पुन्हा ह्या भक्तियोगाचे निरूपण भगवंतांनी का केले आहे?१.

सर्व साधनांचे कारणरूप भक्तीच या परमार्थात उत्तमोत्तम मार्ग आहे. या भक्तीचे स्वरूप विशद करताना श्रीस्वामिमहाराजांनी भक्तिमार्गातील दहा भूमिका दाखविल्या आहेत.

१. '**प्रथममसङ्गतया भगवदुद्देशेन स्वाश्रमोचित कर्मानुष्ठानम् ।**'

परमेश्वरप्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान हीच भक्तिमार्गाची पहिली भूमिका आहे. असा कर्मयोग ज्ञान व भक्ती या दोन्हींचा पायाच आहे. ज्ञानेश्वरमाउलींच्या मते कर्म करताना कर्तृत्वाचा अभिमान आणि फलाचा अभिलाष हे दोन बंध आहेत. 'तैसा कर्तृत्वाचा मद। आणि कर्मफळाचा आस्वाद। या दोहोंचेही नांव बंध। कर्माचा कीं।।' हा दुहेरी बंधांत न सांपडता केलेल्या कर्माने चित्तशुद्धी होते. ही भक्ती आणि ज्ञान या दोन्ही योगांना उपकारक आहे.

### ।। सिद्ध उवाच ।।

**भक्तिरेवानुत्तमात्र सर्वसाधनकारिणी । कर्मज्ञस्याप्यभक्तस्य मोघं कर्मेत्यथाब्रवीत् ।।२।।**

अत्र सर्व+साधन+कारिणी भक्तिः एव अनुत्तमा। अभक्तस्य कर्मज्ञस्य अपि कर्म मोघं इति। अथ (भक्तियोगं) अब्रवीत्।२।

२. **ततो महत्सेवा**.

असे ईश्वराच्या आराधनेसाठी स्वधर्माचे आचरण केल्याने ईश्वराची कृपा होते आणि ईश्वराभिन्न सद्गुरूंची प्राप्ती होते. संतांची किंवा सद्गुरूंची सेवा ही भक्तीची दुसरी भूमिका होय. (*ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात्सताम्। ईशप्रसादस्तद्रूपः सुलभश्चात्र सद्गुरुः।।*)

३. **ततस्तत्कृपा**.

संत आणि सद्गुरू यांच्या कृपेने ज्ञानाचे सर्व प्रतिबंध दूर होतात आणि चित्तातील सर्व दुर्भावना मावळतात. आणि मुक्तिदायक विज्ञान क्षणमात्रात प्रकट होते. '*सद्गुरोः संप्रसादेऽस्य प्रतिबंधक्षयस्तथा। दुर्भावनातिरस्काराद्विज्ञानं मुक्तिदं क्षणात्।।*' सद्गुरुकृपा ही भक्तीची तिसरी भूमिका आहे.

४. **ततस्तद्धर्मश्रद्धा**.

त्यानंतर त्यांच्या धर्मावर दृढ श्रद्धा होते.

५. **ततो भगवत्कथाश्रवणम्**.

पाचव्या भूमिकेत भगवंतांच्या कथांचे श्रवण घडते.

६. **ततो भगवति रतिः**

भगवंताच्या लीलांचे आणि गुणांचे श्रवण झाले की त्यांच्या पादपद्मी प्रेम उपजते.

७. **तया च देहद्वयविवेकज्ञानम्**.

ईश्वराच्या प्रेमातून स्थूल, सूक्ष्म, कारण या देहांचा विवेक होतो आणि आपण त्यापासून वेगळे असल्याची जाणीव होते.

८. **ततो दृढा भक्तिः**

मग भक्ती दृढ होते.

९. **ततो भगवत्तत्त्वज्ञानम्** .

दृढ भक्तीने भगवंताचे यथार्थ ज्ञान होते.

१० **ततस्तत्कृपया सर्वज्ञत्वादिभगवद्गुणाविर्भावः**

मग त्याच्याच कृपेने सर्वज्ञत्वादि त्याच्या गुणांचा आविर्भाव होतो. ही भक्तीची चरम भूमिका होय.

साहजिकच भक्तीचे परमश्रेष्ठत्व आणि सर्वसाधनकारित्व सिद्ध होते. भक्तीच्या अभावी तत्त्वज्ञानेही केलेले कर्म व्यर्थच आहे. ईशावास्योपनिषदात केवळ कर्माची उपासना करणारे गाढ अंधःकारांत प्रवेश करतात (*अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते।*९.) बृहदारण्यक उपनिषदांत (१:१५:१६) कर्माने पितृलोकाच्या प्राप्तीचे वर्णन असले तरी परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याच्या विषयी ते निरर्थकच ठरते. पितृलोकादि कर्माने प्राप्त होणारे लोक हे नश्वर आहेत; (छांदोग्य उ. ८:१:६). याउलट भगवत्प्रसादाने लभ्य असे ज्ञानरूप फल नित्य आहे असेच श्रुतींचे प्रतिपादन आहे. एका भक्तीनेच मोक्ष लाभतो असे सांगणाऱ्या अनेक श्रुती (*नान्यः पन्था विद्यतेऽयनाय।* श्वेताश्वतर उ.३:८) आणि स्मृती आहेत. '*तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते।।*' भ.गीता १०:१०. माझे निरंतर अनुसंधान ठेवून प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्या भक्तांना मी बुद्धियोग देतो, ज्यायोगे ते मला येऊन मिळतात.' '*पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।*' भ.गीता ८:२२. 'हे पार्था, तो परमपुरुष अनन्य भक्तीनेच लाभतो.' '*भक्त्या मामभिजानन्ति यावन्यश्चास्मि तत्त्वतः।*' भ.गीता १८:७५. या सर्व प्रमाणांवरून श्रीगुरूंनी चित्तशुद्धीकारक कर्मयोगानंतर ज्ञानप्रद भक्तियोगाचे निरूपण केले आहे.२.

**त्रिभिर्योगपथैरेव परस्परसहायकैः । ब्रह्माद्वन्द्वं समं शान्तं गम्यते नैकयोगतः ।।३।।**

त्रिभिः परस्पर+सहायकैः योगपथैः एव अद्वन्द्वं समं शांतं ब्रह्म गम्यते। न एक+योगतः।३।

कर्म, भक्ती आणि ज्ञान या तीनही परस्परांना साह्यभूत योगांच्या समुच्चयानेच निर्द्वंद्व, सम आणि शांत ब्रह्माची प्राप्ती होते. कोणत्याही एकाच योगाने नाही. हा फार महत्त्वाचा सिद्धांत श्रीस्वामिमहाराजांनी इथे मांडला आहे. हे तीनही मार्ग वेगवेगळे नसून एकमेकांना पूरक आहेत. त्या तिन्हींचा अवलंब क्रमशः केल्यानेच परमार्थ फलदायी होतो. केवळ कर्मयोगाचेच अनुष्ठान केले तर चित्तशुद्धी होईल; पण आत्मसाक्षात्कारासाठी आवश्यक ते ज्ञान होणार नाही. तसेच '*शास्त्रे परे च निष्णात*' अशा आचार्यांच्या प्रसादाने अपरोक्ष ज्ञान जरी झाले तरी त्याची धारणा होत नाही. असंभावना, विपरीतभावना इत्यादि प्रतिबंध चित्ताच्या मालिन्यामुळे अपरोक्ष ज्ञानालाही परोक्षासारखे करून टाकतात. आणि अपरोक्षसंस्कारसुद्धा भ्रमनिवृत्तीला असमर्थच ठरतो. परंतु भगवंताच्या भक्तीने चित्तातील मल समूल नष्ट झालेल्या आणि भगवंताकडूनच प्राप्त झालेल्या अपरोक्ष ज्ञानरूपी प्रसाद पावलेल्यांना मात्र कांही यत्न न करताच मोक्ष अगदी हाताच्या तळव्यावरच्या आवळ्यासारखा सुलभ आहे. म्हणूनच यमाने नचिकेताला सांगितले आहे की, ज्याला हा परमात्मा निवडतो त्यालाच तो प्राप्त होतो. (*यमेवैष वृणुते तमेव लभ्यः। कठ उ.* १:२:२३) श्वेताश्वतर उपनिषदांतही (६:२३) हाच सिद्धांत दृढ केला आहे. ज्याची देवावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच गुरूवर आहे त्यालाच हे अर्थ प्रकाशतात (*यस्य देवे परा भक्ति यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः।।*).३.

**श्रद्धालुः सात्त्विको भक्तो नितरां भगवत्प्रियः । सकार्ममपि तद्भिन्नं शश्वत्क्षिपति दुर्भवे ।।४।।**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मण्यपि कर्म यः । स लोके भक्तिमान्धीमान् मुच्यते कर्मबन्धनात् ।।५।।**

श्रद्धालुः सात्त्विकः भक्तः नितरां भगवत्+प्रियः। तत्+भिन्नं सकार्मं अपि शश्वत् दुः+भवे क्षिपति।४। यः कर्मणि अकर्म पश्येत अकर्मण्यपि कर्म (पश्येत्) सः लोके भक्तिमान् धीमान् कर्म+बन्धनात् मुच्यते।५।

देवाला प्रिय होण्याचा भक्ती हाच एक उपाय आहे. माझ्या ठायी चित्त स्थिर करून जे परम श्रद्धेने, निरंतर ध्यान-भजनाने माझी उपासना करतात ते मी सर्व योग्यांत श्रेष्ठ मानतो (*मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते। श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः।।* भ.गीता १२:२) या भगवंतांच्या वचनावरून श्रद्धावान् आणि सात्त्विक भक्त त्यांना अत्यंत प्रिय आहे हे दिसते. चित्तांत भक्ती नसेल तर कितीही कर्मशूर झाला तरी त्याला ईश्वर पुनःपुनः दुःखमय अशा जन्ममरणरूपी संसारांत फिरवत ठेवतो. कठोपनिषदांत (१:२:५) सांगितल्याप्रमाणे अज्ञानमूलक कर्मांतच मग्न असलेले, स्वतःला पंडित मानणारे आंधळ्याच्या मागे जाणाऱ्या आंधळ्यांसारखे मूढ वेड्यावाकड्या मार्गांत फिरून संसारदुःख भोगतात. '*अविद्यायामन्तरे वर्तमानः स्वयं धीराः पण्डितम्मन्यमानाः। दन्द्रम्यमाणाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः।।*' भगवद्गीतेतही श्रीकृष्ण ह्याचीच पुष्टी करतात. त्या (आसुरी प्रवृत्तीच्या) द्वेषी, क्रूर नराधमांना मी वरचेवर संसारात अशुभ आणि आसुरी योनीत टाकतो (*तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु।।*).४.

हा श्रीमद्भगवद्गीतेतील (४:१८) श्लोकाचा अनुवाद आहे. लोहचुंबक आपल्या केवळ सान्निध्याने लोहांत गती निर्माण करतो. तसाच हा प्रत्यगात्मा (जीवात्मा) बुद्धी आणि इंद्रियांचा चालक आहे म्हणून त्यालाच '**कर्म**' ही संज्ञा दिली आहे. चालक असूनही त्याला त्यापासून कांहीही अभिमानादि विकार होत नाहीत. अशा आत्म्याशी इन्द्रियांकडून होणाऱ्या क्रियारूपी कर्माचा कांहीच संबंध नसतो.

**भक्तियोगमयं तस्य भक्तिगम्यस्य चेष्टितम् । शृणु तस्मिन्दृढा भक्तिः पूता यच्छ्रवणाद्भवेत् ।।६।।**

तस्य भक्ति+गम्यस्य भक्ति+योग+मयं चेष्टितं शृणु यत्+श्रवणात् पूता तस्मिन् दृढा भक्तिः भवेत्।६।

हाच संबंधाचा अभाव म्हणजे '**अकर्म**'. अर्थात् सर्व कर्माच्या चालक आत्म्याशी बुद्धी, इंद्रिये इत्यादींच्याकडून होणाऱ्या कर्माशी कांहीच संबंध नाही असे जो जाणतो तोच खरा बुद्धिमान. तसेच बुद्धी, इंद्रिये इत्यादि जड वस्तूंच्या ठायीच (**अकर्मणि**) जो जाणणे, ऐकणे, पाहणे इत्यादि कर्मे पाहतो तोच खरा बुद्धिमान. सर्वसाधारण जीवमात्र बुद्धी, इंद्रिये आदि उपाधीशी तादात्म्य झाल्याने आत्म्यावर (स्वतःवर) कर्तृत्वाचा आरोप करून भ्रमांत पडतात. *प्रकृति करी कर्में । तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ।।* ज्ञानेश्वरी १८:३२६।।. जो विवेकी आहे, खरा शहाणा आहे, तो कर्माच्या ठिकाणी अकर्म पाहतो आणि अकर्माच्या ठिकाणी कर्म पाहतो. आपण बसलेली आगगाडी फलाटावरच उभी असूनही शेजारची गाडी सुटली की आपली गाडीच उलट दिशेने चालू लागल्याचा दृष्टिभ्रम होतो. तसाच अविद्येच्या मोहात सापडलेला जीव आपल्या ठिकाणी कर्म पाहतो. पण ते इंद्रियादि जड प्राकृतिक उपाधीचे (अकर्माचे) आहे असे जाणणारा बुद्धिमानच कर्मबंधांतून सुटतो. मोक्ष पावतो.५.

**भक्तीची व्याख्या -** त्या भक्तिगम्य श्रीगुरूंच्या भक्तियोगाने भरलेल्या लीला ऐक, ज्या ऐकून चित्त शुद्ध होऊन त्यांच्या ठायी दृढ भक्ती जडते. भक्ती म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी अनुरक्ती. **भज** धातूपासून हा शब्द झालेला आहे. *भज* या धातूला क्तिनि प्रत्यय लावून भक्ती हा शब्द होतो. हा भावात्मक घेतला तर *भजन* असा अर्थ होतो; तोच अधिकारार्थी घेतला तर ज्या क्रियेत जीव आणि ईश्वर वेगळे असतात (*विभेज्येते*) ती भक्ती; आणि करणार्थी भक्ती म्हणजे जिच्या योगाने कामादि दोषांचे भर्जन होते (*भज्यन्ते*) ती भक्ती.६.

**भिक्षां सशिष्यगुरव एकैकः प्रत्यहं ददौ । भास्कराख्यो द्विजो दीन आययौ तत्र भक्तिमान् ।।७।।**
**आदाय गुरवे भिक्षां दातुकामो गुरुप्रियः । स त्रिपुंभुक्तिपर्याप्तं तण्डुलादिकमाप तम् ।।८।।**
**तद्दिने केनचिद्दत्ता भिक्षा श्रीगुरवे वरा । शिष्यभक्तयुजे तत्र सोऽपि भोक्तुं ययौ द्विजः ।।९।।**
**सायमेत्य मठे भिक्षा-द्रव्यमादाय स द्विजः । सुष्वापैवं त्रिमासं स तत्र तस्थौ सुभाविकः ।।१०।।**

स+शिष्य+गुरवे प्रति+अहं एक+एकः भिक्षां ददौ। तत्र भास्कर+आख्यः दीनः भक्तिमान् द्विजः आययौ।७। सः गुरु+प्रियः गुरवे भिक्षां दातुकामः त्रि+पुं+भुक्ति+पर्याप्तं तण्डुल+आदिकं आदाय तं आप।८। तत् दिने केनचित् शिष्य+भक्त+युजे श्रीगुरवे वरा भिक्षा दत्ता। सः द्विजः अपि तत्र भोक्तुं ययो।९। सायं एत्य सः द्विजः भिक्षा+द्रव्यं आदाय मठे सुष्वाप। एवं सः सुभाविकः तत्र त्रि+मासः तस्थौ।१०।

गाणगापुरी रोज पाळीपाळीने एक एक ब्राह्मण श्रीगुरूंना शिष्यांसहित भिक्षेला बोलावीत. एकदा तिथे भास्कर नावाचा एक गरीब पण भक्तिमान ब्राह्मण आला.७. श्रीगुरूंवर प्रीती करणारा तो ब्राह्मण त्यांना भिक्षा देण्याच्या इच्छेने तीन माणसांच्या जेवण्यापुरते तांदूळ आदि साहित्य घेऊन त्यांच्याकडे मठांत आला.८. त्या दिवशी कुणी तरी श्रीगुरूंना शिष्य-भक्तांसहित उत्तम पक्वान्नसहित भिक्षा दिली. तो भास्कर ब्राह्मणही त्यांच्याबरोबर तिकडेच जेवायला गेला.९. जेवून संध्याकाळी परतल्यावर तो ब्राह्मण आपण आणलेली भिक्षेची सामुग्री घेऊन मठातच झोपला. अशा रीतीने रोजच श्रीगुरूंच्या पंक्तीला जेवून परत येऊन मठात झोपण्याचा त्याचा क्रम सुरू झाला. पाहता पाहता तीन महिने असेच गेले.१०.

**तं तत्रोपहसन्ति स्म प्राप्य स्वल्पान्नतो गुरुम् । भिक्षां दातुं प्राज्यशिष्यं पुष्णाति स्वमितीतरे ।।११।।**
**तज्ज्ञात्वा तं प्रभुः प्राह भक्तियोगविधित्सया । द्राङ्मे सशिष्यभक्ताय भिक्षां देह्यद्य भाविक ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा हृषितः शाक-सितादुग्धघृतादिकम् । स आनीय स्वयं पाकं कर्तुमारेभ उत्तमम् ।।१३।।**

तत्र तं स्वल्प+अन्नतः प्राज्य+शिष्यं गुरुं भिक्षां दातुं प्राप्य स्वं पुष्णाति' इति इतरे हसन्ति स्म।११। प्रभुः तत् ज्ञात्वा भक्ति+योग+विधित्सया तं प्राह, '(हे) भाविक, अद्य स+शिष्य+भक्ताय मे द्राक् भिक्षां देही'।१२। तत् श्रुत्वा हृषितः सः शाक+सिता+दुग्ध+घृत+आदिकं आनीय स्वयं उत्तमं पाकं कर्तुं आरेभे।१३।

त्याचा हा क्रम पाहून इतर लोक त्याची थट्टा करू लागले, 'हा पहा, मोठा शिष्यपरिवार असलेल्या आपल्या गुरूंना भिक्षा द्यायला म्हणून मोजकी सामुग्री घेऊन आला आहे; पण त्या निमित्ताने आपलेच उदरभरण करतो आहे.'११. त्या लोकांनी केलेला त्याचा उपहास श्रीगुरूंच्या ध्यानात आला. तेव्हा भक्तियोगाचे प्रात्यक्षिक दाखविण्याच्या इच्छेने ते भास्कराला म्हणाले, 'अरे भाविका, आज मला सर्व शिष्य आणि भक्तांसहित लवकर भिक्षा दे.'१२. ते ऐकून भास्कर एकदम आनंदित झाला. त्याने लगेच साखर, दूध, तूप वगैरे पदार्थ आणले उत्साहाने स्वतःच उत्तम स्वयंपाक करायला लागला.१३. त्या वेळी दुसऱ्या एका भक्ताने श्रीगुरूंना भिक्षा देण्याची इच्छा प्रकट केली. त्याला, 'तू उद्या भिक्षा दे' असे सांगून ते भास्कराला म्हणाले, 'सगळ्यांना आमंत्रण कर!' पहिले कुणाचे भिक्षेचे बोलावणे नसताना 'उद्या बोलव' असे सांगणे संन्यासधर्माच्या नियमात बसत नाही. पण इथे श्रीगुरूंसाठी '**अज**' शब्दाची योजना करून ते जन्ममरणादि विकारांच्या पलीकडे असल्याचे सूचित केले आहे. धर्मरक्षणासाठी स्वेच्छेने नरदेह धारण केलेल्या भक्तपराधीन पूर्णकाम श्रीगुरूंनी क्वचित् भक्तवात्सल्याने संन्यासधर्माची मर्यादा उल्लंघन केली तरी त्याचा त्यांना यत्किञ्चितही दोष लागत नाही. ज्ञानी पुरुषांनी विधिनिषेधाचे अतिक्रमण केले तरीही त्यांचे ज्ञान अबाधितच राहते. ब्रह्मज्ञानी पुरुषाचा महिमा नित्य आहे. तो कर्मामुळे वाढत वा घटत नाही असे बृहदारण्यक उपनिषदाचे (४:४:२३) प्रतिपादन आहे. (*एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा न कनीयान्।*). अर्थात् शिष्यांनी मात्र त्यांचे अनुकरण करून चालणार नाही.

**दातुं तदान्यमप्युत्कं भिक्षां देहि श्व इत्यजः । तं निवार्याह्वयाशेषान्भोक्तुमित्याह भास्करम् ।।१४।।**
**तच्छ्रुत्वाप्याह्वयत्तान्स त ऊचुर्लज्जसे न किम् । पक्वान्नकणतुल्यान्नः किमाहूय करिष्यसि ।।१५।।**

तदा अन्यं अपि भिक्षां दातुं उत्कं अजः 'श्वः देहि' इति निवार्य, 'अशेषान् आह्वय' इति भास्करं आह।१४। तत् श्रुत्वा सः तान् आह्वयत्। ते ऊचुः। 'न लज्जसे किम्? पक्त+अन्न+कण+तुल्यात् नः आहूय किं करिष्यसि?'१५।

तैत्तिरीय उपनिषदाच्या आदेशानुसार, 'जे आमचे सुचरित आहे त्याचेच तू अनुकरण कर, इतरांचे नाही.' (*यान्यस्माकं सुचरितव्यानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि।*) केवळ पूर्वीच्या माहात्म्यांनी केले म्हणून त्याचे अनुकरण करणे श्रुतीला मान्य नाही. परशुरामानी मातेचा वध केला; शुनःशेपाने पित्याचा, याज्ञवल्क्याने आचार्यांचा, गौतमाने इंद्ररूप अतिथीचा त्याग केला; बह्मदेवांनी आपल्या कन्येशी संग केला; इंद्राने पुरोहिताचा वध केला; बलरामाने क्षत्रिय असून सुरापान केले, तसेच पुराणिकाचा वध केला; चंद्राने गुरुपत्नीचे अपहरण केले; म्हणून आपणही तसेच वागावे असे नाही तर या महान पुरुषांनी जी प्रसिद्ध, दोषरहित, अनिंद्य, शास्त्रमान्य, लोकमान्य अशी लौकिक व वैदिक कर्तव्ये केली त्यांचे अनुकरण करावे असा वेदवाक्याचा आशय आहे. उदाहरणार्थ, परशुरामाने अत्यंत दुष्कर असूनही पित्याची आज्ञा पाळली; शुनःशेपाने विश्वामित्राच्या उपकाराची जाणीव ठेवली; याज्ञवल्क्याने तपाचरणाने सूर्याला प्रसन्न करून शुक्लयजुर्वेदाचे प्रतिपादन केले; गौतमाने स्वपत्नीशी व्यभिचार करणाऱ्या इंद्राचेही प्राण घेतले नाहीत; ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या उत्पत्तीसाठी प्रचंड श्रम केले; साक्षात् शेष असूनही देवब्राह्मणांच्या कार्यासाठी बलरामाने मानवाचा देह स्वीकारला; त्रैलोक्याच्या स्वास्थ्यासाठी इंद्राने अतिनिंद्य असे ब्रह्महत्येचे पाप अंगीकारले; चंद्राने गुरूंची महान् कीर्ती वाढविली इत्यदि सत्कर्मांचे अनुकरण करावे, असा श्रुतीचा आदेश आहे. श्रीगुरूंनी केलेल्या राजोपचारांचे धारण, पालखीत बसणे इत्यादि अन्य कर्मे सुद्धा त्यांच्या तेजस्वीयतेमुळे निंदनीय नाहीत. मात्र इतरानी त्यांचे अनुकरण केल्यास त्यांचे पतन होणार हे निश्चित!१४. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो ब्राह्मणांना आमंत्रण करू लागला. ते त्याला म्हणाले, 'तुला कांही लाजलज्जा आहे की नाही? तू शिजवलेल्या अन्नांत जेवढे कण आहेत तितकेच आम्ही जेवणारे आहोत. आम्हाला बोलावून काय करणार आहेस?'१५.

**तच्छ्रुत्वैत्य गुरुं तत्स शशंस भगवांस्तदा । आनयित्वात्र भोक्तव्यं सर्वैरित्याह तान्गुरुः ॥१६॥**
**शङ्किता अपि तद्वाक्यात् तूष्णीं स्थित्वा बहूनि ते । निर्माय भुक्तिपात्राणि सर्वे स्नात्वाययुः पुनः ॥१७॥**
**शाट्येशस्याज्ञयाच्छाद्य सिद्धान्नं तीर्थमन्त्रितम् । सहान्यैः षड्विधं सोऽदाद् गुरवे ब्राह्मणैः सह ॥१८॥**
**भक्ताञ्छिष्यान्स तत्रत्यां-स्त्र्यपत्येष्टयुजो द्विजान् । गुरुं चेष्टं सुखं भोक्तुं प्रार्थयामास सादरम् ॥१९॥**
**परमान्नान्नपौल्याज्य-सूपशाकादिषड्रसैः । षोढान्नममितं नीतं त्रिपुंपर्याप्तपाकतः ॥२०॥**

तत् श्रुत्वा सः गुरुं एत्य शशंस। तदा भगवान् गुरुः तान् अत्र आनयित्वा, 'सर्वैः भोक्तव्यम्', इति आह।१६। ते शंकिता अपि तत्+वाक्यात् तूष्णीं स्थित्वा सर्वे बहूनि भुक्ति+पात्राणि निर्माय स्नात्वा पुनः आययुः।१७। सः ईशस्य आज्ञया तीर्थ+मन्त्रितं षड्+विधं सिद्धान्नं शाट्या आच्छाद्य अन्यैः ब्राह्मणैः सह गुरवे अदात्।१८। सः तत्रत्यांन् स्त्री+अपत्य+इष्ट+युजाः द्विजान् गुरुं च, इष्टं सुखं भोक्तुं सादरं प्रार्थयामास।१९। त्रि+पुं+पर्याप्त+पाकतः परमान्न+अन्न+आज्य+सूप+ शाकादि षड्रसैः षोढान्नं अमितं नीतम्।२०।

त्यांचे ते बोलणे ऐकून तो बिचारा श्रीगुरूंकडे आला आणि त्याने त्यांना ते सांगितले. तेव्हां श्रीगुरू भगवान् म्हणाले, त्या सर्वांना इकडे आणून त्यांच्याबरोबरच आज जेवायचे आहे. हा श्रीगुरूंचा निरोप ऐकल्यावर त्या ब्राह्मणांनी मनांतला संशय मनांतच ठेवून सगळ्यांनी पत्रावळी केल्या आणि स्नानादिक उरकून मठात आले.१७. मग त्या भास्कर ब्राह्मणाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार केलेल्या सर्व स्वयंपाकावर मंत्रित तीर्थाने प्रोक्षण केले आणि त्यावर श्रीगुरुदेवांची छाटी टाकली. मग इतर कांही ब्राह्मणांच्या मदतीने ते सहा प्रकारचे अन्न श्रीगुरूंना आणि ब्राह्मणांना वाढले. नवव्या अध्यायात भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चार प्रकारचे (चतुर्विध) अन्न सांगितले. त्यांत पापड कुरुड्या इत्यादि चर्व्य आणि दूध, पानक इत्यादि पेय हे दोन प्रकार धरून षड्विध अन्न होते.१८. मग त्या भास्कराने गाणगापूरच्या सर्व ब्राह्मणांना, त्याच्या स्त्रिया, मुले, इष्ट आदिंसहित सर्वांना आणि श्रीगुरूंना आदराने हात जोडून हवे ते सुखाने जेवण्यासाठी प्रार्थना केली.१९. तीन माणसांपुरत्याच केलेल्या त्या स्वयंपाकातून पायस, पोळ्या, तूप, वरण, भाज्या इत्यादि षड्रसपूर्ण (गोड, तिखट, आंबट, खारट, तुरट व कडू) षड्विध अन्न किती नेले त्याची मोजदाद नाही.२०.

**नीत्वा नीत्वापि भोक्तृभ्यो दत्तं तत्र तु पूर्ववत् । नाप्यल्पं दातृभिस्तष्टं चेष्टा भगवतस्त्वियम् ।।२१।।**
**भुक्तं सशेषमाकण्ठं तृप्ताः स्मोऽलमिति द्विजाः । उक्त्वोत्तस्थुः सहाजेन ततो गुर्वाज्ञयाङ्घ्रिजान् ।।२२।।**
**हीनांश्चाहूय तेभ्योऽदात्कामं नान्नं व्यहीयत । पशुपक्षिमृगादिभ्यः प्रकामं स उपानयत् ।।२३।।**
**न शिष्टास्तत्र केपीति श्रुत्वा भुक्त्वा तदाज्ञया । यादोभ्योऽदात्स शेषान्नं तदा निःशेषतां ययौ ।।२४।।**
**माधुर्यं सुरसान्नस्य दुर्लभं ह्यमृतान्धसाम् । स्वप्नेऽपि न श्रुतं रुच्यं तृप्तिरेषाप्यलौकिकी ।।२५।।**

नीत्वा नीत्वा भोक्तृभ्यः दत्तं तत्र तु पूर्ववत्। न अल्पं न अपि दातृभिः तष्टम्। इयं तु भगवतः चेष्टा।२१। द्विजाः सशेषं 'आकण्ठं भुक्तं', 'तृप्ताः स्मः', 'अलं' इति उक्त्वा अजेन सह उत्तस्थुः। तदा सः गुरु+आज्ञया हीनां च आहूय तेभ्यो कामं (अन्नं) अदात्, अन्नं न व्यहीयत्। सः पशु+पक्षि+मृग+आदिभ्यः प्रकामं उपानयत्।२२-२३। 'के अपि न शिष्टा' इति श्रुत्वा तत्+आज्ञया भुक्त्वा सः शेष अन्नं यादोभ्यः अदात्। तदा निःशेषतां ययौ।२४। सुरस+अन्नस्य माधुर्यं अमृत+अन्धसां हि दुर्लभम्। स्वप्ने अपि न श्रुतं रुच्यम्। एषा तृप्तिः अपि अलौकिकी।२५।

भरभरून नेऊन जेवणाऱ्यांना वाढले तरी ते छाटीखालचे अन्न जसेच्या तसेच राहिले. न त्यात कांही घट झाली, न वाढणाऱ्यांनाही कमी पडले! ही अष्टैश्वर्यसंपन्न भगवंताचीच लीला होय.२१. सगळे ब्राह्मण 'पुरे, पुरे', 'आम्ही तृप्त झालो', 'गळ्यापाशी अन्न आले', असे म्हणत श्रीगुरूंच्या सह उठले. मग श्रीगुरूंच्या आज्ञेने भास्कराने शूद्रादिकांना बोलावून त्यांना यथेच्छ अन्न वाढून दिले. तरीही ते कमी झाले नाही असे पाहून पशुपक्ष्यांनाही भरपूर घातले.२२-२३. शेवटी गावात कुणीही जेवायचे राहिले नाही याची खातरजमा करून तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने जेवला. नंतर उरलेले अन्न त्याने नदीत जलचरांना घातले तेव्हा कुठे ते अन्न संपले.२४. तिथे जेवलेले लोक म्हणू लागले, या रसभरित अन्नाची गोडी खरोखर देवदुर्लभ आहे. स्वप्नातही इतके रुचकर अन्न खायला काय ऐकायलाही मिळाले नाही. या अन्नाने आलेली ही तृप्तीसुद्धा अलौकिक आहे.२५.

**प्राक्पार्थसङ्कटेऽरण्ये निशीथेऽदात्स्वमायया । ऋषिभ्योऽन्नं हरिरिति श्रुतं दृष्टं त्वदोऽत्र तु ।।२६।।**

'प्राक् हरिः पार्थ+सङ्कटे अरण्ये निशीथे स्व+मायया ऋषिभ्यः अन्नं अदात् इति श्रुतम्। अत्र तु दृष्टम्।२६।

'पूर्वी पांडवांवरील संकटाचे निवारण करण्यासाठी श्रीकृष्णांनी अरण्यांत आपल्या मायेच्या प्रभावाने ऋषींना अन्न दिले असे ऐकले होते. पण आज मात्र प्रत्यक्ष पाहण्यात आले.' ही महाभारतातील कथा थोडक्यात अशी. एकदा दुर्योधनाने दुर्वास ऋषींचे आतिथ्य करून त्यांना प्रसन्न करून घेतले. त्यात त्याचा हेतू असा होता की द्यूतांत राज्य गमावून वनवासात असलेल्या पांडवांचा दुर्वास ऋषींच्या शापाने नाश व्हावा. म्हणून दुर्योधनाने त्यांना असा वर मागितला की, 'आमच्या कुळांत युधिष्ठिर ज्येष्ठ आहे. त्याचेही आतिथ्य आपण स्वीकारावे. मात्र आमच्या द्रौपदीवहिनी उपाशी असतांना आपण जाऊ नये. त्यांचे जेवण झाले की मग जावे.' दुर्वास मुनी पांडवांच्या घरी रात्रीच्या वेळी गेले. युधिष्ठिराने परमादराने त्यांचे स्वागत केले आणि आह्निक उरकून जेवायला येण्याची विनंती केली. आपल्या शिष्यसंघाबरोबर मुनी नदीवर स्नानादिकांसाठी गेले. द्रोपदीला सूर्याने दिलेल्या थाळीतून अक्षय अन्न मिळत असे. मात्र तिचे जेवण झाल्यानंतर ते बंद होत असे. तेव्हा आता या सर्व ऋषींच्या भोजनाची काय व्यवस्था करावी अशा चिंतेत द्रौपदी पडली. तेव्हा तिने भगवान श्रीकृष्णांचे स्मरण केले. आठवण केल्याबरोबर भक्तवत्सल श्रीकृष्ण तात्काळ तिच्यासमोर उपस्थित झाले. द्रौपदीने सांगितलेला वृत्तांत ऐकून भगवान म्हणाले, 'त्या ऋषींच्या जेवणाचे आपण पाहू काय करायचे ते. आधी मला भूक लागली आहे! कांही तरी खायला दे.' द्रौपदीला खूप लाज वाटली. ती म्हणाली, 'अरे कृष्णा, सर्वांची जेवणे झाल्यावर मी जेवते. माझे जेवण होईपर्यंत थाळीतील अन्न अक्षय असते. पण माझे जेवण झाल्यावर मात्र थाळीत कांहीच अन्न उरत नाही.' तेव्हा द्रौपदीला खूप आग्रहाने श्रीकृष्णांनी ती थाळी आणायला लावली. त्या वेळी त्या थाळीच्या काठाशी किंचितशी भाजी लागलेली होती. ती बोटाने चाटून श्रीकृष्णाने, 'या अन्नाने विश्वात्मा भगवान प्रसन्न होवो, (*अनेन विश्वात्मा भगवान प्रीयताम्।*)' असे म्हटले. मग त्यांनी द्रौपदीला सर्व मुनींना जेवायला बोलवायला सांगितले. तेव्हा ते सगळेच अत्यंत तृप्त झाले होते.२६.

**नृणां चतुःसहस्राणि भुक्तानि स्वल्पपाकतः । जीवा अगणिता भुक्ता मायाऽतर्क्येयमीशितुः ।।२७।।**
**भास्करोऽयं प्रियो भक्तो यत्प्रसादोऽस्य नान्यके । त्रिमासं सर्वदा तेन पादसंवाहनादिभिः ।।२८।।**
**श्रद्धाभक्त्यैव भगवान् सेवितस्तत्फलं त्विदम् । इत्युक्त्वान्ये नराः प्रेम्णा तुष्टुवुः श्रीगुरुं परम् ।।२९।।**

स्वल्प+पाकतः नृणां चतुः सहस्राणि भुक्तानि, जीवाः अगणिताः भुक्ताः। इयं ईशितुः माया अतर्क्या।२७। अयं भास्करः प्रियः भक्तः यत् अस्य प्रसादः न अन्यके। तेन त्रिमासं सर्वदा पाद+संवाहनादिभिः श्रद्धा+भक्त्या एव भगवान् सेवितः इदं तत्+फलम्।' अति उक्त्वा अन्ये नराः परं श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टुवुः।२८-२९।

थोड्याशाच स्वयंपाकात चार हजार माणसे आणि अगणित जीव जेवून तृप्त झाले, ही ईश्वराची माया खरेच अतर्क्य आहे. 'अणूपेक्षांही सूक्ष्म असलेला हा परमात्मा अतर्क्य आहे,' ह्या कठोपनिषदाच्या (१:२:८) प्रतिपादनाची साक्ष इथे पटते.२७. ते लोक पुढे एकमेकांना म्हणू लागले, हा भास्कर श्रीगुरूंचा प्रिय भक्त आहे; कारण याच्यासारखा कृपाप्रसाद दुसऱ्या कुणालाही मिळाला नाही. त्याने तीन महिने श्रद्धेने आणि भक्तीने श्रीगुरुभगवंतांची पाय दाबणे इत्यादि सेवा केली त्याचेच हे फळ होय. असे बोलून दुसरे लोक प्रेमभराने श्रेष्ठ अशा श्रीगुरूंची स्तुती करू लागले.२८-२९.

श्रीगुरूंनी भास्कराला ईप्सित वर देऊन त्याच्या घरी बोळविले. पुढे तो गुरुप्रसादाने सर्व ऐहिक भोगांचा भोग घेऊन अन्ती सायुज्य मुक्ती पावला. अंत म्हणजे देहांत असा अर्थ घ्यावा किंवा सत्य आणि असत्य, द्वैत आणि अद्वैत यांची सरमिसळ भासवणाऱ्या संसाररूपी भ्रमाचा अंत असा घ्यावा. सायुज्य मुक्ती म्हणजे आत्यंतिक मोक्ष. अर्थात् निर्गुण साक्षात्कार.

**दत्वा प्रभुर्भास्करमीप्सितं वरं प्रस्थापयामास गृहाय स द्विजः ।**
**ईशप्रसादात्सकलार्थयुग्ययौ सायुज्यमन्ते दृढभक्तियोगतः ।।३०।।**

प्रभुः भास्करं ईप्सित+वरं दत्वा गृहाय प्रस्थापयामास। सः द्विजः ईश+प्रसादात् सकल+अर्थ+युक् अन्ते दृढ+भक्तितः सायुज्यं ययौ।।३०।

इथे अशी शंका येऊ शकते की, श्रीगुरू हे साक्षात् ईश्वराचेच अवतार असले तरी ते साकार असल्याने सगुणच आहेत. मग सगुणाच्या उपासनेने निर्गुण साक्षात्काररूपी आत्यंतिक मोक्ष कसा होईल? याविषयी अमलानंद कल्पतरूंत लिहितात - *निर्विशेषं परं ब्रह्म साक्षात्कर्तुमनीश्वराः। ये मन्दास्तेऽनुकम्प्यन्ते सविशेषनिरूपणैः।। वशीकृते मनस्तेषां सगुणब्रह्मशीलनात्। तदेवाविर्भवेत्साक्षादपेतोपाधिकल्पनम्।।* निर्गुण परब्रह्माचा साक्षात्कार करण्याला असमर्थ अशा मंदबुद्धीच्या साधकांवर दया करून श्रुतिमाउलीने सगुण ब्रह्माचे निरूपण केले आहे. सगुणब्रह्माच्या परिशीलनाने त्यांनी मनाला वश केल्यावर सहजच उपाधिरहित (निर्गुण) ब्रह्म प्रकट होते. ब्रह्म शब्द 'बृह' धातूपासून झाला आहे. वृद्ध (विस्तृत) वस्तू असा त्याचा अर्थ आहे. ही वृद्धी निरतिशय (unqualified) आहे. कारण त्याला कुठलेच संकोचक (limiting) उपपद वाचक वगैरे लावलेले नाही. '*अथातो ब्रह्मजिज्ञासा*' या सूत्राच्या भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे निरतिशय वृद्ध (वाढलेला, वाढणारा) या बृह धातूच्या अर्थांतूनच नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान हे अर्थ प्रतीत होतात. तेच ब्रह्म श्रीगुरू नृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांच्या रूपाने अवतलेले आहे हे आपण आठव्या अध्यायात पाहिलेच आहे. सायुज्य म्हणजेच आत्यंतिक मोक्ष हा केवळ भगवत्प्रसादानेच लाभतो हे पुनःपुनः सांगितले आहे.३०.

**शृण्वन्यदप्यद्भुतमीशचेष्टितं गङ्गाह्वया तत्र तु षष्टिवत्सरा ।**
**साध्वी वशानर्च परमेशमन्वहं भक्त्यैकदोचे स तु तां किमिच्छसि ।।३१।।**

**।। गङ्गोवाच ।।**

**लोकोऽपुत्रस्य न स्वःस्था लुप्तपिण्डोदकक्रियाः । पितरोऽधः पतन्तीति श्रुत्वा स्वामिन् बिभेम्यहम् ।।३२।।**
**भवेऽग्रे सुपुत्राप्त्या गतिर्भूयादितीच्छया । सर्वेश तेऽर्चनं कुर्वे पाहि मां करुणानिधे ।।३३।।**

अन्यत् अद्भुतं ईश+चेष्टितं शृणु। तत्र तु गङ्गा+आह्वया षष्टि+वत्सरा वशा साध्वी अनु+अहं भक्त्या परम+ईशं आनर्च। एकदा सः तु तां ऊचे, 'किं इच्छसि?'३१। गङ्गा उवाच। 'अपुत्रस्य लोकः न। (हे) स्वामिन्, स्वः+स्थाः पितरः लुप्त+पिंड+उदक+क्रियाः अधः पतन्ति इति श्रुत्वा अहं बिभेमि।३२। (हे) सर्वेश, (हे) करुणा+निधे, अग्रे भवे सु+पुत्र+आप्त्या गतिः भवेत् इति इच्छया ते अर्चनं कुर्वे।३३।

साक्षात् ईश्वरस्वरूप सद्गुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक! तिथे गाणगापुरात एक गंगा नावाची साठ वर्षांची वंध्या सती रोज न चुकता येऊन अत्यंत भक्तीपूर्वक श्रीगुरू परमेश्वरांची पूजा करीत असे. एकदा त्यानी तिला विचारले, 'तुझी काय इच्छा आहे?'३१. गंगा उत्तरली, 'ऐतरेय ब्राह्मणांत (७:३:१) अपुत्राला (पर)लोक लाभत नाही असे म्हटले आहे. स्वर्गातही गेलेल्या पितरांचा, श्राद्ध आणि तर्पणाचा लोप झाल्याने अधःपात होतो असे वेदवचन ऐकून मला भीती वाटते.'३२. 'हे सर्वेश्वरा, दयासागरा, ह्या जन्मात नाही तरी निदान पुढच्या जन्मात सुपुत्राचा लाभ होऊन सद्गती मिळावी ह्याच इच्छेने मी आपले पूजन करते.'३३.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**कमावर्तेन मायाब्धौ क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम् । क्वेयं तत्र स्मृतिस्तेऽत्र पुत्रौ गङ्गे भविष्यतः ॥३४॥**
**तच्छ्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वोचे पुत्रवत्यहो । निष्कला जातिवन्ध्यापि भवेयं त्वत्प्रसादतः ॥३५॥**
**व्रततीर्थार्चने यातं वयो मे पुत्रकामया । विशेषात्सेवितोऽश्वत्थो मौर्ख्याद्दास्यति किं स मे ॥३६॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**ब्रह्मनारदसंवादं शृण्वात्थ यदसत्तु तत् । नारदाश्वत्थमूलेऽहं मध्येऽजोऽग्रे शिवः पुनः ॥३७॥**

श्रीगुरुः उवाच। 'माया+अब्धौ कर्म+आवर्तनेन क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम्? ते तत्र इयं स्मृतिः क्व? गङ्गे अत्र पुत्रौ भविष्यतः।'३४। तत् श्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वा (सा) ऊचे। अहो निष्कला जाति+वन्ध्या अपि त्वत्+प्रसादात् पुत्रवती भवेयम्।३५। 'मे पुत्र+कामया वयः व्रत+तीर्थ+अर्चने यातम्। विशेषतः मौर्ख्यात् अश्वत्थः सेवितः। स मे किं दास्यति?'३६। श्रीगुरुः उवाच। 'यत् आत्थ तत् असत्। ब्रह्म+नारद+संवादं शृणु।' '(हे) नारद, अश्वत्थ+मूले अहं, मध्ये अजः अग्रे शिवः।३७।

श्रीगुरू तिला म्हणाले, 'या मायेच्या सागरांतील कर्माच्या चक्रात तू कुठे कुठे फिरणार आहेस हे तू जाणतेस काय? त्या जन्मात जरी तुला पुत्रप्राप्ती झाली तरी ती माझीच कृपा आहे ही आठवण तुला राहील का? ऐक गंगे, याच जन्मात तुला दोन (एक कन्या आणि एक) पुत्र होतील.'३४. ते ऐकून गंगेने पदराला गाठ मारली आणि म्हणाली, 'मी जन्मतःच वंध्या आहे आणि आतां तर मला ऋतूही येत नाही. तरी आपल्या प्रसादाने मी पुत्रवती होईन असा विश्वास वाटतो.'३५.

**अवाक्प्रत्यगुदक्शाखास् त्रयाणां प्राक्समाः सुराः । तीर्थाब्धयश्चाङ्कुरेषु गोयज्ञर्षिश्रुतिद्विजाः ।।३८।।**
**ॐकारोऽङ्घ्र्यन्तशीर्षस्थ इत्यश्वत्थोऽस्त्यसंस्कृतः ।**
**नार्च्यः संस्कृत्य मौञ्ज्युक्त-कालेऽस्मिन्सत्क्षणेऽर्चयेत् ।।३९।।**

पुनः त्रयाणां अवाक्, प्रत्यक्, उदक् शाखाः। प्राक् समाः सुराः। अङ्कुरेषु तीर्थ+अब्धयः च गो+यज्ञ+ऋषि+श्रुति+द्विजाः।३८। ॐकारः अङ्घ्रि+ अन्त+शीर्ष+स्थः। इति अश्वत्थः अस्ति। असंस्कृतः न अर्च्यः। अस्मिन् मौञ्जी+उक्त+काले संस्कृत्य सत्+क्षणे अर्चयेत्।३९।

'मी पुत्रप्राप्तीच्या इच्छेने व्रत, तीर्थे आणि पूजा करण्यात सगळे आयुष्य घालविले. विशेषतः अश्वत्थाची (पिंपळाची) पूजा-प्रदक्षिणादि सेवा केली. तो पिंपळ मला अभागिनीला काय पुत्र देणार?'३६. श्रीगुरू तिला म्हणाले, 'अश्वत्थाला तू बोल लावतेस तो खरा नाही. '*अश्वत्थः सर्ववृक्षाणां*' असे भगवंत गीतेत (१०:२६) सांगतात. अश्वत्थाचे (पिपंळाचे) माहात्म्य विशद करणारा नारद आणि ब्रह्मदेव यांचा संवाद तू ऐक. 'नारदाने प्रश्न केल्यावर ब्रह्मदेवांनी त्याला सांगितले, 'नारदा, अश्वत्थाच्या मुळाशी मी स्वतः, मध्ये विष्णू आणि शेंड्यावर शंकर वास करतो.३७. तसेच त्याच्या दक्षिण, पश्चिम आणि उत्तर शाखांवरही त्याच क्रमाने आम्ही वसतो. पूर्व शाखेवर सर्व देवता राहतात. आणि त्याच्या पालवीत सर्व तीर्थे, सागर, गोमाता, यज्ञ, ऋषी, वेद आणि ब्राह्मण वसतात.३८. ॐकाराच्या अ, उ आणि म या मात्रा त्याच्या मूळ, मध्य आणि टोकाशी, ऋक्, यजुः, साम या वेदांसहित तसेच भूः, भुवः, स्वः या लोकांसहित वास करतात. असा हा अश्वत्थ वृक्ष आहे. अश्वत्थाचे पूजन त्याची मुंज केल्याशिवाय करू नये. विहित काळी त्याची मुंज केल्यावर चांगला मुहूर्त पाहून पूजा करावी.'३९.

**नार्कारशुक्रनिट्सन्ध्या-कुयुक्पर्वादिषु स्पृशेत् । वर्णित्वमौनसत्त्वाढ्यो भजेन्नामुं वधूरपि ।।४०।।**
**तत्तले गोविशा लिप्ते रञ्जिते स्वस्ति वाचयेत् । संस्नाप्य सप्तकलशैः पूजयेत्स्वाधिकारतः ।।४१।।**
**ध्यात्वाष्टबाहुं श्रीविष्णु-रूपमावेष्ट्य वाससा । नाममन्त्रैर्मंदगत्या शक्त्या कार्याः प्रदक्षिणाः ।।४२।।**
**नमेत्प्रदक्षिणायास्तु भक्त्याद्यन्तसमाप्तिषु । पदे पदे मेधफलं दैन्यर्णार्त्यघतापहृत् ।।४३।।**
**ग्रहार्तिघ्नं सौरिवारे तन्नामोच्चारणं तरोः । सदेशेऽपैति नुः काल-मृत्यू रौद्रमनोर्जपात् ।।४४।।**

अर्क, आर, शुक्र, निट्, सन्ध्या, कुयुक्+पर्व आदिषु न स्पृशेत्। वर्णित्व+मौन+सत्त्व+आढ्यो अमुं ना, वधूः अपि भजेत्।४०। तत् तले गो+विशा लिप्ते स्वस्ति वाचयेत्। सप्त+कलशैः संस्नाप्य स्व+अधिकारतः पूजयेत्।।४१।। अष्ट+बाहुं श्रीविष्णु+रूपं ध्यात्वा वाससा आवेष्ट्य मन्द+गत्या शक्त्या प्रदक्षिणाः कार्या।४२। प्रदक्षिणायाः आदि+अन्त+समाप्तिषु भक्त्या नमेत्। पदे पदे मेध+फलं दैन्य+ऋण+आर्ति+अघ+ताप+हृत्।४३। सौरि+वारे तत्+नाम+उच्चारणं ग्रह+आर्ति+घ्नम्। तरोः सदेशे रौद्र+मनोः जपात् नुः काल+मृत्यू अपैति।४४।

रविवार, मंगळवार, शुक्रवार, रात्री, सायंकाळी अशुभ योगी वा पर्वकाळी अश्वत्थाला स्पर्श करू नये. ब्रह्मचर्य, मौन, सत्यवचन आदि नियम पाळून ह्याला पुरुषाने आणि स्त्रीनेही पुजावे.४०. अश्वत्थाच्या खाली गोमयाने सारवावे. प्रथम स्वस्तिवाचन करावे; मग सात कलशांनी त्याला स्नान घालावे आणि आपल्या स्त्री, पुरुष, वर्ण आदि अधिकारानुसार पूजा करावी.४१. श्रीविष्णूंच्या अष्टभुज रूपाचे ध्यान करावे. अश्वत्थाला वस्त्राने वेढावे. मग विष्णुसहस्रनामातील प्रत्येक नामाच्या चतुर्थ्यंत रूपाने जप करीत हळूहळू शक्त्यनुसार प्रदक्षिणा कराव्यात.४२. प्रदक्षिणेच्या सुरुवातीला, मध्यभागी आणि शेवटी भक्तीपूर्वक नमस्कार करावा. प्रदक्षिणेच्या पावलागणिक अश्वमेधाचे फळ मिळते. नामोच्चारणाने दैन्य, ऋण, पीडा, पाप आणि (आध्यात्मिकादि) ताप दूर होतात.४३. शनिवारी पिंपळाची प्रदक्षिणा करीत शनीच्या नावाचा उच्चार केल्याने ग्रहांची बाधा दूर होते. ('*कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोऽन्तको यमः। सौरिः शनैश्चरो मन्दो पिप्पलादेन संस्तुतः।।*' शनैश्चरस्तोत्र १४)४४.

**तत्रातिफलदा ब्रह्म-भुज्याप्लुतिजपाध्वराः । पुत्रादिकामसिद्ध्यै नो विलम्बोऽक्षय्यपुण्यदात् ।।४५।।**
**येनेह स्थापितोऽश्वत्थस्तेन स्वः स्थापितं कुलम् । येन च्छिन्नोऽपि वंशः स्वस्तेन च्छिन्नो न संशयः ।।४६।।**
**प्रदक्षिणादशांशेन हवनं तद्दशांशतः । कृत्वा ब्रह्मभुजिं दद्याद्धैमाश्वत्थार्थगोतिलान् ।।४७।।**
**सद्ब्रह्मभ्यो लभेदिष्टमित्यूचे नारदं विधिः । तस्मात्तं विधिना साध्वी भज द्राक्सिद्धिदोऽस्ति सः ।।४८।।**

तत्र ब्रह्म+भुजि+आप्लुति+अध्वराः अति+फलदाः। अक्षय्य+पुण्य+दात् पुत्र+आदि+काम+सिद्ध्यै नो विलम्बः।४५। येन इह अश्वत्थः स्थापितः तेन स्वः कुलं स्थापितम्। येन छिन्नः तेन अपि स्वः वंशः छिन्नः न संशयः।४६। प्रदक्षिणा+दश+अंशेन हवनं, तत् दशांशतः ब्रह्म+भुजिं कृत्वा हैम+अश्वत्थ+अर्थ+गो+तिलान् सत्+ब्रह्मेभ्यः दद्यात्। इष्टं लभेत। इति विधिः नारदं ऊचे। तस्मात् (हे) साध्वी, तं विधिना भज। सः द्राक् सिद्धिदः अस्ति।४७-४८।

अश्वत्थाच्या जवळ मृत्युंजय ('*त्र्यंबकं यजामहे*') मंत्राचा जप केला असता कालमृत्यूही टाळता येतो. मग अपमृत्यूची काय कथा? अश्वत्थाखाली ब्राह्मणभोजन, स्नान, जप, यज्ञ हे केले असता अधिक फळ मिळते. अक्षय्य पुण्य देणाऱ्या अश्वत्थाच्या सेवेने पुत्रादि इच्छांची पूर्ती होण्यास विलंब लागत नाही.४५.

ज्याने या भूलोकांत पिंपळ लावला त्याने आपला वंशच स्थिर केला; आणि ज्याने पिंपळाचे झाड तोडले त्याने जणू आपलाच वंशच्छेद केला.४६. व्रताच्या सांगतेसाठी उद्यापन सांगितले आहे. प्रदक्षिणेच्या दशांश हवन आणि त्याच्या दशांश ब्राह्मणभोजन करून सोन्याचा पिंपळ, गाय दक्षिणा आणि तीळ यांचे सात्त्विक आणि विद्वान् ब्राह्मणाला दान करावे. असे ब्रह्मदेवाने नारदांना सांगितले. असा संवादाचा समारोप करून श्रीगुरू गंगेला म्हणतात, 'याकरिता हे सती, त्या पिंपळाची तूं पूजा कर. तो शीघ्र सिद्धिदायक आहे.'४७-४८.

**त्वं भीमामरजायोगे स्नात्वा षट्कूल उत्तमम् । संगमस्थं भजाश्वत्थं सत्यं पुत्रौ भविष्यतः ।।४९।।**
**तथा कुर्वेऽपि षष्ट्यब्दा मत्वोक्तिं तव वेदवत् । इत्युक्त्वा सेश्वराश्वत्थं पत्या भेजे यथाविधि ।।५०।।**

'त्वं भीमा+अमरजा+योगे षट्कूले स्नात्वा सङ्गमस्थं उत्तमं अश्वत्थं भज। सत्यं पुत्रौ भविष्यति।'४९। 'तव उक्तिं वेदवत् मत्वा षष्टि+अब्दा अपि तथा कुर्वे,' इति उक्त्वा स+ईश्वर+अश्वत्थं पत्या यथाविधि भेजे।५०।

**सकाम उपासना -** इथे हे लक्षात घ्यायचे आहे की सकाम उपासना ही प्रत्यक्षतः मोक्षाला उपयुक्त नाही. तरी पण कामाने ज्यांची मने कलुषित आहेत त्यांना इच्छापूर्तीसाठी का होईना ईश्वराचे भजन घडते आणि अंतर्मुखता येऊन ईश्वरभजनाची गोडी लागते. ईश्वरभजनाच्या प्रभावाने कामबीजाचे भस्म होते. हा वस्तुशक्तीचा प्रभाव आहे. वासनेचे बीज जळून गेल्यावर ईश्वरभक्तीद्वारा अधिकार प्राप्त होतो आणि भगवंताचा कृपाप्रसाद होतो. क्षुद्रदेवतांच्या आराधनाने मिळालेल्या फळासारखे हे फळ नाशिवंत नसते. देवतामय अश्वत्थाच्या भजनाच्या उपदेशातून आणि त्याला ॐकाररूप दाखवून इथे असाही आदेश मिळतो की संसारवृक्षाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवावी. प्रपंचातही परमार्थ पाहावा असा भावार्थ.

पुढे तिला श्रीगुरूंनी सांगितले की, 'तू भीमा आणि अमरजा यांच्या संगमाच्या षट्कूलात स्नान करून संगमावरील उत्तम अशा पिंपळाची सेवा कर. खरोखर तुला एक कन्या आणि एक पुत्र होतील.' अन्नमय कोशाची ब्रह्मदृष्टीने उपासना केल्यास सर्व अन्नाची प्राप्ती होते तसेच हे फळ सांगितले आहे. आपल्या भावानुसार सिद्धी होते असा अभिप्राय.४९ 'आपले वचन वेदतुल्य मानून मी अश्वत्थाला देवतास्वरूप मानून त्याची सेवा करते' असे श्रीगुरूंना बोलून तिने आपल्या पतीसह त्या पिंपळाची आणि त्याखाली बसलेल्या सद्गुरूंची यथाविधी पूजा केली.५०.

**चतुर्थेऽह्न्याह तत्स्वप्ने कृत्वाश्वत्थप्रदक्षिणाः । यद्दास्यति गुरुर्भुङ्क्ष्व भवेत्पुत्र इति द्विजः ।।५१।।**
**साप्युत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य सद्गुरुम् । भक्त्या प्रदक्षिणीकृत्य साश्वत्थं प्रणनाम ह ।।५२।।**
**दत्त्वा फले स तां प्राह दानं देहि समाप्य सत् । व्रतं प्रदक्षिणारूपं फले भुंक्ष्वेष्टकामदे ।।५३।।**
**प्राग्युगेऽनेकपुत्राः स्युरौरसो दत्तकस्त्विह । औरसस्तूत्तमोऽस्यास्य-दर्शनं पितृमुक्तिदम् ।।५४।।**
**तत्साध्वीहौरसौ पुत्रौ तारकौ ते भविष्यतः । मदर्चनफलं त्वेतन्न सन्देहोऽत्र शोभने ।।५५।।**

अश्वत्थ+प्रदक्षिणाः कृत्वा चर्तुथे अह्नि तस्य स्वप्ने द्विजः 'यत् गुरुः दास्यति भुङ्क्ष्व' इति।५१। सा अपि उत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य, सद्गुरुं स+अश्वत्थं भक्त्या प्रदक्षिणीकृत्य प्रणनाम ह।५२। सः तां फले दत्वा प्राह। प्रदक्षिणा+रूपं सत् व्रतं समाप्य इष्ट+कामदे फले भुङ्क्ष्व।५३। 'प्राक् युगे अनेक पुत्राः स्युः, इह तु औरसः दत्तकः (च)। औरसः तु उत्तम+उत्तमः, अस्य दर्शनं पितृ+मुक्तिदम्।५४। तत् (हे) साध्वि, इह ते औरसौ तारकौ पुत्रौ भविष्यतः। (हे) शोभने, एतत् तु मत्+अर्चन+फलं अत्र न संदेहः।५५।'

तिने आरंभिलेल्या अश्वत्थसेवेच्या चौथ्या दिवशी तिच्या स्वप्नात एका ब्राह्मणाने येऊन सांगितले की, 'पिंपळाला प्रदक्षिणा घातल्यावर तुला श्रीगुरू जे देतील ते भक्षण कर.'५१. तिने सकाळी उठून स्नान केले आणि संगमावर जाऊन पिंपळासहित सद्गुरूंना भक्तीपूर्वक प्रदक्षिणा करून नमस्कार केला.५२. त्यांनी तिला दोन फळे देऊन सांगितले की, 'तुझ्या प्रदक्षिणात्मक व्रताची दान करून समाप्ती कर आणि ही फळे खा.'५३. गरुडपुराणांत 'किती प्रकारचे पुत्र असतात?' या गरुडाच्या प्रश्नाला उत्तर देताना भगवान् विष्णूंनी चौदा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत. मात्र कलियुगांत औरस आणि दत्तक हे दोनच पुत्र शास्त्रसंमत आहेत. (*औरसो दत्तकश्चैव कलौ द्वावेव संमतौ। औरसो धर्मपत्नीज..*) जिवंतपणी औरस पुत्राचे मुखदर्शन पित्याचे ऋण फेडून त्याला मुक्ती देणारे असते असे ऐतरेय ब्राह्मणाचे (७:३:१) वचन आहे. तरी हे साध्वी, तुला या जन्मीच दोन तारक औरस पुत्र (एक कन्या आणि एक पुत्र) होतील. हे शोभने, हे तू केलेल्या माझ्या अर्चनाचेच फळ आहे यांत संशय नाही.'५४-५५.

**तथेत्युक्त्वापि सा गेहं गत्वा चक्रे यथोदितम् । निष्कलाप्यृतुमत्यासीन् निःसीममहिमा प्रभोः ।।५६।।**
**शुद्धूर्ध्वं सह पत्यैत्य सा प्रपूज्य गुरुं मुदा । गृहं गत्वा दधौ गर्भं तन्निशीशप्रसादतः ।।५७।।**
**स्वतन्त्रसंविद्भगवान् लीलां को वेत्ति यत्स्तुतौ । द्विसहस्ररसज्ञोऽपि कुण्ठितश्चकिता श्रुतिः ।।५८।।**
**वलीपलितवेपैर्यद्देहो विद्धो जराकृशः । साधत्त गर्भमित्यन्ये प्रशशंसुः परस्परम् ।।५९।।**
**तद्भर्ता सोमनाथस्तु प्रीत्या पुंसवनादिकाः । क्रिया व्यधात्क्रमात्पुत्रीं कालेऽसौषीत्ततः सती ।।६०।।**

सा अपि 'तथा' इति उक्त्वा गेहं गत्वा यथा उदितं चक्रे । (सा) निष्कला अपि ऋतुमति आसीन्। प्रभोः निःसीममहिमा।५६। सा शुद्धि+ऊर्ध्वं पत्या सह एत्य मुदा गुरुं प्रपूज्य गृहं गत्वा तत् निशि ईश+प्रसादात् गर्भं दधौ।५७। यत् स्तुतौ द्वि+सहस्र+रसज्ञः अपि कुण्ठितः, श्रुतिः चकितः, स्वतन्त्र+संवित् भगवान् (तस्य) लीलां कः वेत्ति?५८। अन्ये परस्परं प्रशशंसुः, 'यत् देहः वली+पलित+वेपैः विद्धः जरा+कृशः सा गर्भं आधत्त।'५९। तत् भर्ता सोमनाथः तु प्रीत्या क्रमात् पुंसवनादिकाः क्रिया व्यधात्। ततः काले सती पुत्रीं असौषीत्।६०।

श्रीगुरूंची आज्ञा मान्य करून ती घरी गेली आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे तिने ती फळे खाल्ली. श्रीगुरूंच्या अपार महिमेने ती गतार्तवा वृद्धाही ऋतुस्नात झाली.५६. चौथ्या दिवशी स्नान करून शुद्ध झाल्यावर ('*चतुर्थेऽह्नि शुद्ध्यति.*' पराशरस्मृति ७:१७) पाचव्या दिवशी ती पतीसह श्रीगुरूंकडे येऊन आनंदाने त्यांची पूजा करून घरी गेली. भगवंताच्या कृपाप्रसादाने त्याच रात्री तिला गर्भधारणा झाली.५७. ज्याची स्तुती करता करता शेषाला दोन हजार जिभाही पुरल्या नाहीत आणि वेदही चक्रावून गेले त्या अपराधीनबुद्धी भगवंताच्या लीला कुणाला तरी कळतील का?५८. सर्व लोक आर्श्चर्याने परस्परांना म्हणू लागले, 'जिचा देहावर वळ्या पडलेल्या आहेत, केस पांढरे झाले, अंगाला कांप आहे, वार्धक्याने देह कृश झालेला आहे, अशा म्हातारीला गर्भ राहिला!'५९. तेव्हा गंगेच्या पतीने, सोमनाथाने हौसेने क्रमशः पुंसवनादि शास्त्रविहित गर्भाचे संस्कार केले. मग त्या सतीने यथाकाल एका मुलीला जन्म दिला.६०.

**तदेयं कन्यका साध्वी सच्छीलगुणशालिनी । भविष्यति कुलोद्धर्त्री पुत्राढ्येत्याह दैववित् ।।६१।।**
**तच्छ्रुत्वा स द्विजेभ्योऽदादर्थवस्त्रादिकं द्विजः । प्रापतुर्द्वादशेऽह्नीशं कन्यामादाय दंपति ।।६२।।**
**तत्पादाब्जान्तिकं कन्यां संस्थाप्योचे प्रणम्य सा । संसृतिस्थजरद्वन्ध्य-द्रुमस्ते फलितो दृशा ।।६३।।**

तदा दैववित् 'इयं कन्यका साध्वी, सत्+शील+गुण+शालिनी कुल+उद्धर्त्री पुत्र+आढ्या भविष्यति' इति आह।६१। तत् श्रुत्वा सः द्विजः द्विजेभ्यो अर्थ+वस्त्र+आदिकं अदात्। द्वादशे अह्नि दंपति कन्यां आदाय ईशं प्रापतुः।६२। तत्+पाद+अब्ज+अन्तिकं कन्यां संस्थाप्य प्रणम्य सा ऊचे। 'ते दृशा संसृति+स्थ+जरत्+वन्ध्य+द्रुमः ते दृशा फलितः।६३।

तेव्हा ज्योतिष्यांनी जातक वर्तविले की, 'ही कन्या साध्वी, सुशील गुणवान्, कुळाचा उद्धार करणारी आणि पुत्रवती होईल.'६१. ते भाकीत ऐकून त्या सोमनाथ ब्राह्मणाने ब्राह्मणांना दक्षिणा, वस्त्रे इत्यादि दिले. बाराव्या दिवशी ते दोघे पतिपत्नी कन्येला घेऊन श्रीगुरूंकडे आले.६२. त्यांच्या चरणकमलांच्या सन्निध त्या कन्येला ठेवून उभयतांनी नमस्कार केला आणि ती गंगा श्रीगुरूंना म्हणाली, 'अहं-ममतेने संसारात स्थिरावलेला हा वठलेला आणि वांझ देहरूपी वृक्ष आपल्या कृपाकटाक्षाने फळला आहे.'६३.

फळांनी बहरलेला वृक्षसुद्धा त्याची फळे चांगली असली तरच वाटसरू त्याला स्वीकारतात. **सुफल** म्हणजे पुत्रवान असला तरच वाटसरू म्हणजे स्वर्गलोकाची अपेक्षा असलेले पूर्वज अंगीकारतात. ऐतरेय ब्राह्मणानुसार पुत्र हा प्रकाशरूप मुक्ती देणारा असतो तर पुत्री ही कष्टदायिनी असते. अर्थात् संतान होऊनही ती कन्या असेल तर मोघफलच नाही का? त्यापेक्षा वन्ध्यत्व बरे! असा तिचा अभिप्राय दिसतो. 'प्रभो, आपण जाणताच' असंही ती म्हणते आहे. पण हा अर्थ गौणपक्षी आहे असे श्रीमहाराज म्हणतात.

**सेव्यते फलितोऽपि द्रुः पान्थैश्चेत्सुफलो वरम्। वन्ध्योऽपि मोघफलत इति भातीश वेत्सि तत् ।।६४।।**

फलितः अपि द्रुः सुफलः चेत् पान्थैः सेव्यते। मोघ+फलतः वन्ध्यः अपि वरं इति भाति। (हे) ईश तत् वेत्सि।'६४।

मुख्यार्थ पुढीलप्रमाणे आहे. श्रीगुरूंच्या उपासनेने शुद्धचित्त ब्राह्मणीला कन्येच्या गर्भ वाढवण्याचे आणि प्रसूतीचे जे कष्ट झाले त्यांनीच वैराग्य उत्पन्न झाले. त्यामुळेच ह्या संततीपासून प्राप्त होणारी सुखे आणि लोक घेऊन काय करायचे? आत्मा हाच आपला नित्य आणि परमानंदस्वरूप लोक आहे असा तिचा निश्चय झाला. त्या भूमिकेतून ती बोलत आहे. **संसृतिस्थ** म्हणजे मी आणि माझे ह्या बुद्धीने संसारांत स्थिर झालेल्या, **जरत्** म्हणजे वृद्ध, पुरुषत्वाने प्राप्त होणारा कर्माधिकार नसलेली म्हणून **वंध्यः**, कर्माचरणाला अयोग्य, अर्थात् कर्मफलरहित म्हणजे वांझ **वृक्ष**, म्हणजेच पंचभूतांच्या संघातात्मक देह; तो आपल्या कृपाकटाक्षाने **फलित** झाला म्हणजे विवेक उत्पन्न झाला; तो **सुफलित** म्हणजे मोक्षपर्यवसायी झाला तरच **पान्थैः** म्हणजे मुमुक्षूंनी अंगीकारला जातो; अन्यथा **मोघफलतो** स्वर्गादिलक्षण नाशिवंत भोगांचे फल असेल तर तो त्याज्य ठरतो. त्यापेक्षा पाप-पुण्यविरहित (*वंध्यत्वं वरं*) निष्फलताच बरी. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. शंकरार्चायांनी कठोपनिषदांतील (२:३:१) '*ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख*' या मंत्रावरील भाष्यात केलेले समष्टिरूप आणि व्यष्टिरूप देहावरील रूपक दिले आहे. त्याचा भावार्थ असा -

'जन्म, जरा, मृत्यू, शोक आदि अनेक अनर्थांचा बनलेला; क्षणाक्षणाला रूप पालटणारा; माया, मृगजळ, आकाशांतील मेघांची गंधर्वनगरी यांसारख्या पाहता पाहता नष्ट होणाऱ्या स्वरूपाची; मृत्यूनंतर वृक्षाप्रमाणेच अभावात्मक; केळीच्या बुंध्यासारखा निःसार; पाखंड बुद्धीच्या शेकडो विकल्पांचे मूळ; तत्त्वाच्या जिज्ञासूंनी अनिर्धारित (अनिश्चित) 'इदं' तत्त्वस्वरूप; वेदांताने निश्चित केलेले परब्रह्म ज्याचे मूलसार (अधिष्ठान) आहे;

**तच्छ्रुत्वा सस्मितं कन्यामादायेशो जगाद तौ । शीलधीगुणपुत्राढ्या भवेत्साध्व्यखिलार्चिता ।।६५।।**

तत् श्रुत्वा ईशः सस्मितं कन्यां आदाय तौ जगाद। 'शील+धी+ गुण+पुत्र+आढ्या अखिल+अर्चिता साध्वी भवेत्।'६५।

अविद्या, काम, कर्म आणि अव्यक्त या बीजांपासून अंकुरणारा; परब्रह्मावेगळा, विज्ञान व क्रिया या शक्तिद्वयात्मक हिरण्यगर्भ ज्याचा अङ्कुर आहे; सर्व प्राणी आणि लिंगभेद या ज्याच्या फांद्या आहेत; तृष्णारूपी जलाच्या सिंचनाने ज्याला उग्र दर्प आहे; बुद्धी, इंद्रिय, विषय हेच ज्याची पालवी आहे; श्रुती, स्मृती, न्याय, विद्या, उपदेश ह्या ज्याच्या पाकळ्या आहेत; जो यज्ञ, दान, तप आदि कर्मरूपी फुलांनी बहरलेला आहे; सुख, दुःख, वेदना अशा अनेक रसांनी भरलेला; प्राण्यांच्या उपजीविकेच्या अनंत फळांनी लखडलेला; त्यांच्या तृष्णारूपी पाण्याच्या सिंचनाने ज्याच्या विस्तारलेल्या मुळ्या, एकमेकांत गुंतून जटिल आणि दृढ झाल्या आहेत; ब्रह्मादि पक्ष्यांनी सत्य आदि लोकांची घरटी ज्याच्यावर बांधली आहेत; प्राण्यांच्या सुखदुःखामुळे झालेल्या हर्ष-शोकांपासून प्रकटलेल्या नृत्य, गीत, वादन, क्रीडा, टाळ्या, हास्य, आक्रोश, रुदन, 'हा हा', 'सोड सोड' इत्यादि अनेक शब्दांच्या गदारोळाने झालेला क्षुब्धतम महाध्वनी; याचा उच्छेद केवळ वेदांतविहित ब्रह्मात्मर्दशनरूपी असंगशस्त्राने होतो.'६४. ते ऐकून श्रीगुरूंनी स्मितमुखाने त्या कन्येला उचलून घेतले आणि म्हणाले, 'ही शीलवती, बुद्धिमती, गुणवान्, पुत्रवती आणि सर्वांना पूज्य होईल.' इथे श्रीगुरूंनी आपल्या स्मिताने विवेकसंपन्न झालेल्या ब्राह्मणीवर आपली माया पसरली; कारण आधी दिलेल्या पुत्रप्राप्तीच्या आणि मुक्तीच्या वराचा अनुभव तिला द्यायचा होता.६५.

**कन्या लब्धोत्तमेयं वां पुत्रेच्छा चेद्भवेत्सुतः । मूर्खः शतायुर्वाल्पायुर्विद्वान्वां कतरः प्रियः ।।६६।।**
**सार्भो विद्वान् प्रियोऽल्पायुरपीत्यूचतुरप्युभौ । तथेत्युक्त्वा स सापत्यौ गमयामास तौ प्रभुः ।।६७।।**
**गर्भं साप्यल्पकालेन धृत्वासूत सुतं शुभम् । श्रद्धया निष्कलाप्येवं पुत्रौ लेभेऽथ किं वद ।।६८।।**
**विद्याविनयवान् भूत्वा पितृशुश्रूषणोद्यतः । धार्मिकः पञ्च पुत्रांस्तत्पुत्रो लब्ध्वामृतं ययौ ।।६९।।**
**कन्यापीशप्रसादात्सा दीक्षितस्य सती शुभा । भूत्वा गुरूक्तवद्ब्रह्म-वादिनी प्राप सद्गतिम् ।।७०।।**

'इयं उत्तमा कन्या लब्धा। वां पुत्र+इच्छा चेत् सुतः भवेत्। वां मूर्खः शतायुः, वा अल्पायुः विद्वान्, कतरः प्रियः?'।६६। 'अल्पायुः अपि स+अर्भः विद्वान् प्रियः।' इति उभौ ऊचतुः। 'तथा' इति उक्त्वा सः प्रभुः तौ स+अपत्यौ गमयामास।६७। सा अपि अल्पकालेन गर्भं धृत्वा शुभं सुतं असूत। एवं श्रद्धया निष्कला अपि पुत्रौ लेभे। अथ किं वद।६८। तत् पुत्रः धार्मिकः विद्या+विनयवान् भूत्वा पितृ+शुश्रूषण+उद्यतः पञ्च पुत्रान् लब्ध्वा अमृतं ययौ।६९। कन्या अपि ईश+प्रसादात् गुरु+उक्तवत् दीक्षितस्य शुभा सती ब्रह्मवादिनी भूत्वा सद्गतिं प्राप।७०।

'ही फार उत्तम कन्या तुम्हाला झाली. जर तुम्हाला मुलगा हवा असेल तर तोही होईल. तुम्हाला शतायुषी मूर्ख मुलगा आवडेल की अल्पायुषी पण विद्वान्?'६६. 'अल्पायुषी असला तरी आम्हाला विद्वान् आणि पुत्रवान् मुलगा आवडेल.' या त्यांच्या म्हणण्याला अनुमोदन देऊन त्या श्रीगुरूंनी त्यांची कन्येसहित पाठवणी केली.६७. 'अल्पकाळातच त्या गंगेने गर्भ धारण केला आणि छानशा मुलाला जन्म दिला. अशा रीतीने ऋतू गेलेला असतानाही श्रद्धेच्या बळावर त्या वृद्धेला दोन मुले लाभली. नामधारका, यापेक्षा श्रीगुरूंचे अधिक माहात्म्य काय सांगावे?'६८. त्यांचा तो मुलगा अत्यंत धार्मिक, विद्यावान् आणि विनयशील झाला. तो आईवडिलांच्या सेवेत तत्पर होता. त्याला पाच मुलगे झाल्यावर तो सद्गती पावला.६९. त्यांची ती गुणी कन्यासुद्धा श्रीगुरूंनी सांगितल्याप्रमाणे दीक्षिताची पत्नी आणि ब्रह्मवादिनी होऊन पतीसह सद्गती पावली. स्त्रियांना वेदपठणाचा अधिकार नसताना ती ब्रह्मवादिनी कशी झाली? या प्रश्नाचे उत्तर असे - उपनयनाभावी सांगशाखा वेदाच्या अध्ययनाचा अधिकार नसला, तरी दीक्षिताच्या पत्नीला मंत्रपाठ आणि श्रवणाचा अधिकार आहे.७०.

**एवं गुरुप्रभावोऽयं श्रद्धादृष्ट्यैव दृश्यते । सद्भक्तैर्न त्वभक्तैः स जन्मान्धैरिव भास्करः ।।७१।।**
**दण्डकुण्डीकरं शान्तं काषायाच्छादनं सदा । ध्यायन्तौ यतिरूपं तं दम्पती मुक्तिमापतुः ।।७२।।**
**श्रद्धाभक्त्यैव सुलभा गुरुवाक्यानुवर्तिनाम् । उभयी सिद्धिरप्यन्यच्चित्रं तच्चेष्टितं शृणु ।।७३।।**
**तत्रैत्य नरहर्याख्यो विप्रः कुष्ठी जगद्गुरुम् । प्रणतः शरणं प्राप्य प्रावोचद् गद्गदाक्षरः ।।७४।।**
**हरे शम्भो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत । भक्तवत्सल ते कीर्तिं श्रुत्वात्राप्तोऽस्मि सद्गुरो ।।७५।।**

एवं गुरु+प्रभावः। अयं श्रद्धा+दृष्ट्या एव सत्+भक्तैः दृश्यते। सः तु न अभक्तैः (दृश्यते) जन्मांधैः भास्कर इव।७१। दण्ड+कुण्डी+करं शान्तं काषाय+आच्छादनं यतिरूपं तं सदा ध्यायन्तं दम्पती मुक्तिं आपतुः।७२। गुरु+वाक्य+अनुवर्तिनां श्रद्धा+भक्त्या एव उभयी सिद्धिः सुलभा। अन्यत् अपि चित्रं तत् चेष्टितं शृणु।७३। तत्र नरहरि+आख्यः कुष्ठी विप्रः एत्य जगत्+गुरुं प्रणतं शरणं प्राप्य गद्गद+अक्षरः प्रावोचत्।७४। '(हे) हरे, शम्भो, परानन्द+मूर्ते, अच्युत, भक्त+वत्सल, सद्गुरो, जय, जय। ते कीर्तिं श्रुत्वा अत्र आप्तः अस्मि।'७५।

असा हा श्रीगुरूंचा प्रभाव आहे. मात्र श्रद्धारूपी दृष्टी असलेल्या सद्भक्तांनाच तो दिसतो. जन्मांधाला जसा सूर्य दिसत नाही, तसा अभक्तांना सद्गुरुमहिमा दिसत नाही. **श्रद्धा म्हणजे गुरू आणि शास्त्र यांनी उपदेशिलेल्या तत्त्वांवर आणि त्यांच्या प्राप्तीच्या उपायांवर परम विश्वास**.७१. एका हातात दंड आणि एका हातात कमंडलु धारण केलेल्या, भगवी छाटी पांघरलेल्या त्या यतिरूप सद्गुरूंचे निरंतर ध्यान करीत ते सोमनाथ आणि गंगा हे जोडपे मुक्त झाले.७२. गुरुवाक्याला अनुसरणाऱ्यांना श्रद्धायुक्त भक्तीनेच ऐहिक आणि पारलौकिक अशी दुहेरी सिद्धी सुलभ असते. आता श्रीगुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक.७३. तिथे गाणगापुरी एक नरहरी नावाचा कुष्ठी ब्राह्मण आला. त्याने सद्गुरूंना शरण जाऊन त्यांना साष्टांग नमस्कार केला आणि गहिवरलेल्या कंठाने आपली हकीकत सांगितली.७४. सद्गुरूंना लावलेली संबोधने हेतुगर्भ आहेत. हरी म्हणजे पाप हरण करणारा. शंभू म्हणजे आरोग्य देणारा. तसेच परानंदमूर्ती म्हणजे मोक्षदाता. भक्तवत्सल या नावाने त्यांच्या कृपेला आवाहन केले आहे. नरहरी म्हणतो, 'सद्गुरुमहाराज मी आपली कीर्ती ऐकून इथे आलो आहे.'७५.

**यजुर्विदोऽपि मे तुण्डं केऽपि नेक्षन्ति कुष्ठिनः । तीर्थार्चनजपैः कुष्ठं तन्मे नापैत्यघात्मनः ।।७६।।**
**कृपया तेऽपयायात् तदिति मत्वागतोऽस्म्यहम् । नास्ति चेत्तत्प्रतीकारः शंसाग्रेऽसूंस्त्यजामि ते ।।७७।।**
**तच्छ्रुत्वा प्राक्तनाघोत्थं कुष्ठं नश्येदिति प्रभुः । प्रोक्त्वा शुष्कौदुम्बरैधो दृष्ट्वावोचत्सकुष्ठिनम् ।।७८।।**
**मद्वाक्ये भक्तिमांश्चेत् तत्काष्ठमारोप्य सङ्गमे । भज पल्लविते तस्मिन्छुद्धोऽकुष्ठो भविष्यसि ।।७९।।**
**ओमित्युक्त्वा तदारोप्य श्रद्धाभक्त्या स सङ्गमे । भेजे दत्वाधारबन्धं परितोऽम्बुनिषेचनैः ।।८०।।**

'यजुः+विदः अपि मे कुष्ठिनः के अपि तुण्डं न पश्यति। मे अघ+आत्मनः तत् कुष्ठं न अपैति।'७६। 'ते कृपया तत् अपयायात् इति मत्वा अहं आगतः अस्मि। तत् प्रतीकारः नास्ति चेत् शंस, ते अग्रे असून् त्यजामि।'७७। तत् श्रुत्वा प्रभुः 'प्राक्तन+अघ+उत्थं कुष्ठं नश्येत्' इति प्रोक्त्वा शुष्क+औदुम्बर+एधः दृष्ट्वा सः कुष्ठिनं अवोचत्।७८। 'मत्+वाक्ये भक्तिमान् चेत् तत् काष्ठ सङ्गमे आरोप्य भज। तस्मिन् पल्लविते शुद्धः अकुष्ठः भविष्यसि।'७९। 'ॐ' इति उक्त्वा सः श्रद्धा+भक्त्या तत् सङ्गमे आरोप्य, आधार+बन्धं दत्वा, परितः अम्बु+निषेचनैः भेजे।८०।

'मी यजुर्वेद जाणणारा ब्राह्मण असूनही कुष्ठी म्हणून कुणी माझे तोंडसुद्धा पाहात नाहीत. ते कुष्ठ घालविण्यासाठी तीर्थयात्रा, अनेक देवांच्या पूजा आणि जपादिक खूप प्रयत्न केले. पण माझ्या पापाविष्ट देहाची शुद्धी होत नाही.'७६. 'आपल्या कृपेने त्याचा परिहार होईल अशा आशेने मी आलो आहे. जर त्याचा कांही प्रतिकारच नसेल तर तसे सांगा, मी इथेच आपल्या समोर प्रायोपवेशनाने प्राणत्याग करतो.'७७. त्याचे ते बोलणे ऐकून श्रीगुरू म्हणाले, 'पूर्वकर्मांच्या पापामुळे उद्भवलेले हे कुष्ठ नष्ट होईल.' समोर एक औदुंबराचे वाळलेले लाकूड पाहून ते त्या कुष्ठग्रस्ताला म्हणाले.७८. 'माझ्या वाक्यावर तुझी श्रद्धा असेल तर हे लाकूड घेऊन संगमावर लाव आणि त्याला पाणी घालणे इत्यादी सेवा कर. त्या लाकडाला पालवी फुटली की तू शुद्ध होशील आणि तुझे कुष्ठ नाहीसे होईल.'७९. 'ॐ' असे म्हणून ते मान्य करीत त्याने ते वाळलेले लाकूड संगमावर नेऊन तिथे त्याचे आरोपण केले, त्याला आधार देऊन व आळे करून त्याला पाणी घालून त्याची श्रद्धा व भक्तीपूर्वक उपवास करीत सेवा आरंभली.८०.

**कृपाऽस्य सद्यस्तव शुद्ध्यभावादुक्तं फलं कष्टमिदं कुतोऽस्मिन् ।**
**शंकाकुरस्यात इदं त्यजेति जनैर्निषिद्धोऽप्यभजत्सदेध्मम् ।।८१।।**
**तदैत्य ते गुरुं प्राहुर्भवद्वाक्याद्द्विजो जरत् । भजतीध्मं बोधय तं मरिष्यत्युपवासतः।।८२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**करोति साधु तद्विप्रो दृढभक्त्या तरिष्यति । भक्तिर्हि तारकात्रैव भवसिन्धुनिमज्जतः ।।८३।।**
**मन्त्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भि(भे)षजे गुरौ । यादृशी भावना यस्य तस्य सिद्धिस्तु तादृशी ।।८४।।**

'अस्य कृपा सद्यः। तव शुद्धि+अभावात् इदं कष्टं फलं उक्तम्। अस्मिन् अङ्कुरस्य शङ्का कुतः? इदं त्यज।' इति जनैः निषिद्धः अपि (द्विजः) सदा इध्मं अभजत्।८१। तदा ते गुरुं एत्य प्राहुः, 'भवत् वाक्यात् द्विजः जरत् इध्मं भजति। तं बोधय। (अन्यथा) उपवासतः मरिष्यति।'८२। श्रीगुरुः उवाच। तत् विप्रः साधु करोति। दृढ भक्त्या तरिष्यति। अत्र भव+सिन्धु+निमज्जतः भक्तिः एव तारका हि।८३। मन्त्रे, तीर्थे, द्विजे, देवे, दैवज्ञे, भिषजे, गुरौ यस्य यादृशी भावना तस्य तु तादृशी सिद्धिः।८४।

त्याने चालवलेली ती काष्ठसेवा पाहून त्याची दया येऊन कांही लोक त्याला म्हणाले, 'आमच्या श्रीगुरूंची दर्शनमात्रे कृपा होते. तुझ्या पापाला निष्कृती नसेल म्हणून हे कष्टरूपी पापनाशक फळ तुला सांगितले आहे. या वाळून कोळ झालेल्या लाकडाला अंकुर फुटण्याची शंका तरी आहे का? तू हा व्यर्थ खटाटोप सोड.' लोकांनी अनेक वेळा समजावूनही तो ब्राह्मण मात्र त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्या काष्ठाची सेवा करीत राहिला.८१. तेव्हा ते लोक श्रीगुरूंकडे गेले आणि म्हणाले, 'आपल्या वचनानुसार तो कुष्ठी ब्राह्मण खरोखरच ते वाळलेले लाकूड रोपून त्याला पाणी घालतो आहे. त्याला आपणच समजावून सांगा. नाहीतर उपवासांनी तो मरायचा!'८२. श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'तो ब्राह्मण उत्तमच करतो आहे. त्याच्या ह्या दृढ भक्तीने तो तरून जाईल. जितका भाव दृढ असेल तितकेच फलही निश्चित मिळते. ह्या भूलोकात संसारसागरात बुडणाऱ्याला भक्तीच खरोखर तारून नेते. मंत्र, तीर्थ, ब्राह्मण, देव, ज्योतिषी, वैद्य (किंवा औषध) तसेच गुरू यांच्याविषयी ज्याची जशी भावना असेल त्याप्रमाणेच फळ मिळते.'८४.

**वच्मि सूतर्षिसंवादं प्राग्वृत्तं दृढभक्तिदम् । ऋषीन्सूतो जगादेदं सिंहकेतुनृपात्मजः ।।८५।।**
**धनञ्जयाख्यः पाञ्चाल एकदा वनमभ्यगात् । दृष्ट्वा स मृगयाश्रान्तस् तत्र जीर्णं शिवालयम् ।।८६।।**
**तस्थौ तत्र क्षणं साकं शबरेणानुयायिना । दृष्ट्वा लिङ्गानि रम्याणि दूतः प्राह नृपं गृहे ।।८७।।**
**लिङ्गं नीत्वा पूजयितुं कांक्षेऽज्ञोऽस्म्यनुशाधि माम् । यदाज्ञापयसे देव दृढभक्त्या करोमि तत् ।।८८।।**

**।। राजपुत्र उवाच ।।**

**संस्थाप्य सत्स्थले लिङ्गं शुचिर्भूत्वा स्त्रियान्वितः । भक्त्या पूजय मत्वेशमुपचारैर्यथाविधि ।।८९।।**

दृढभक्तिदं प्राक् वृत्तं सूत+ऋषि+संवादं वच्मि। सूतः ऋषीन् इदं जगाद। पाञ्चाले सिंहकेतु+नृप+आत्मजः धनंजय+आख्यः एकदा वनं अभ्यगात्। तत्र सः मृगया श्रान्तः जीर्णं शिव+आलयं दृष्ट्वा तत्र शबरेण अनुयायिना साकं क्षणं तस्थौ। दूतः रम्याणि लिङ्गानि दृष्ट्वा नृपं प्राह। 'लिङ्गं गृहे नीत्वा पूजयितुं काङ्क्षे। अज्ञः अस्मि। मां अनुशाधि। (हे) देव यत् आज्ञापयसे तत् दृढभक्त्या करोमि।'८५-८८। राजपुत्र उवाच। 'लिङ्गं सत्स्थले संस्थाप्य शुचिः भूत्वा स्त्रिया+अन्वितः ईशं मत्वा भक्त्या यथाविधि उपचारैः पूजय।'८९।

श्रीगुरू त्या लोकांना पुढे म्हणतात, 'पूर्वीची एक घडलेली गोष्ट सूत आणि शौनकादि ऋषींच्या संवादरूप तुम्हाला सांगतो. सूतांनी ऋषींना सांगितले. पांचाल देशात सिंहकेतू राजाचा धनंजय नावाचा मुलगा वनात शिकारीसाठी गेला होता. मार्गात थकल्यामुळे तो आपल्या बरोबर असलेल्या भिल्ल चाकरासह एका जुन्या शिवमंदिराजवळ किंचित् काळ थांबला. त्या भिल्ल नोकराने तिथे पडलेली अनेक सुंदर लिंगे पाहिली आणि तो राजपुत्राला म्हणाला, 'महाराज यातील एखादे लिंग नेऊन घरी त्याची पूजा करावी अशी मला इच्छा होत आहे. पण मी अज्ञानी आहे. पूजा कशी करायची वगैरे मला माहीत नाही. गुरुदेवा, आपणच मला उपदेश करावा. आपण जशी आज्ञा कराल तसे मी सर्व दृढ भक्तीने करीन.'८८. राजपुत्राने त्याला सांगितले, 'ते लिंग चांगल्या पवित्र स्थळी ठेवावे. स्नानादींनी शुद्ध होऊन स्त्रीसह ते लिंग म्हणजे प्रत्यक्ष भगवान् शंकर आहेत अशी भावना करून भक्तीपूर्वक यथाविधी उपचारांनी पूजा करावी.'८९.

**चिताभस्मान्वहं देयं दत्तान्नं भुङ्क्ष्व भार्यया । प्रसादबुद्ध्येत्युक्त्वा स पूजाविधिमुपादिशत् ।।९०।।**
**सोऽपि तुष्टो गृहीत्वैकं लिङ्गं गत्वा गृहं स्त्रिया । भेजे यथोपदेशं तद् भस्मादात्प्रत्यहं मुदा ।।९१।।**
**भस्मैकस्मिन्दिने क्वापि न लेभेऽभूत्स दुर्मनाः । तद्भार्या प्राह मां दग्ध्वा शम्भवेऽर्पय भस्म तत् ।।९२।।**
**शरीरं कृमिविड्भस्म-रूपान्तं क्षणभङ्गुरम् । तत्साफल्यं कुरु हरे भस्मार्पणनिमित्ततः ।।९३।।**

'अनु+अहं चिता+भस्मं देयम्। दत्त+अन्नं प्रसाद+बुद्ध्या भार्यया भुङ्क्ष्व।' इति उक्त्वा सः पूजाविधिं उपादिशत्। ९०। सः अपि तुष्टः लिङ्गं गृहीत्वा गृहं गत्वा तत् स्त्रिया यथा+उपदेशं भेजे। प्रति अहं मुदा भस्म अदात्।९१। एकस्मिन् दिने क्व अपि भस्म न लेभे। सः दुर्मनाः अभूत्। तत्+भार्या प्राह, 'मां दग्ध्वा तत् भस्म शम्भवे अर्पय।'९२। कृमि+विट्+भस्म+रूप+अन्तं क्षणभङ्गुरं शरीरं हरे भस्म+अर्पण+निमित्ततः तत् साफल्यं कुरु।

'रोज त्याला चिताभस्म द्यावे. त्याला नैवेद्य दाखविलेले अन्न प्रसाद मानून पत्नीसह भक्षण करावा.' असे सांगून राजपुत्राने त्याला पूजेचा विधी समजावून सांगितला.९०. तो शबर प्रसन्न चित्ताने लिंग घेऊन घरी गेला आणि राजपुत्राच्या उपदेशानुसार स्त्रीसह त्याची पूजा करू लागला. रोज आनंदाने तो लिंगासाठी चिताभस्म आणीत असे. एके दिवशी खूप शोधूनही कुठेच चिताभस्म मिळाले नाही. तेव्हा तो अत्यंत खिन्न झालेला पाहून त्याची पत्नी म्हणाली, 'तुम्ही मलाच जाळून ते भस्म भगवान् शंकरांना अर्पण करा.'९२. 'हया क्षणभंगूर नाशिवंत शरीराचे शेवटी कृमी, विष्ठा, भस्म यांच्यातच परिवर्तन होणार आहे. शिवाला भस्म देण्यासाठी याचा विनियोग करून त्याचे साफल्य करा.'९३.

### ।। शबर उवाच ।।

**तिष्ठत्स्विनक्ष्माग्निषु साक्षिषु प्रिये भर्तृत्वमाश्रुत्य वृतास्यदोऽन्यथा ।**
**कुर्यां कथं तन्वि किशोरि बालिके भो साध्व्यलब्धैहिकसौख्य उत्तमे ।।९४।।**
**सा प्राह मोहो वितथोऽयमध्रुवे येन ध्रुवं साहजिकं प्रसाध्यते ।**
**तत्साधयास्मिन्परकीयकल्पना नास्त्येव तेऽर्धाङ्गविभाग्यदो वपुः ।।९५।।**
**प्रोक्ते सुयुक्ते प्रियया तथेत्यसौ प्रोक्त्वा गृहे तामवरुद्ध्य सालयाम् ।**
**दग्ध्वार्पयद्भस्म शिवाय नित्यवद् भ्रान्त्या प्रसादक्षण आह्वयत्प्रियाम् ।।९६।।**

'(हे) प्रिये इन+क्ष्मा+अग्निषु तिष्ठत्सु भर्तृत्वं आश्रुत्य वृता असि। भो किशोरि, तन्वि बालिके साध्वि, अलब्ध+ऐहिक+सौख्ये, उत्तमे, अदः अन्यथा कथं कुर्याम्?'।९४। सा प्राह। 'अयं अध्रुवे वितथः मोहः। येन साहजिकं ध्रुवं प्रसाध्यते तत् साधय। अस्मिन् देहे परकीय कल्पना नास्ति एव। अदः वपुः ते अर्ध+अङ्ग+विभागी।'९५। प्रियया सुयुक्ते प्रोक्ते 'तथा' इति असौ प्रोक्त्वा तां गृहे अवरुद्ध्य स+आलयां दग्ध्वा (तत्) भस्म नित्यवत् शिवाय अर्पयत्। प्रसाद+क्षणे भ्रान्त्या प्रियां आह्वयत्।९६।

तिचा तो आग्रह पाहून तो शबर तिला म्हणाला, 'प्रिये सूर्य, भूमी आणि अग्नी यांच्या साक्षीने तुझा पोशिंदा, रक्षणकर्ता म्हणून मी तुझा अंगीकार केला आहे. हे असे विपरीत कृत्य मी कसे करू? तुझ्यासारख्या कोवळ्या वयाच्या सुंदर तरुणीची, जिने अजून पुत्रादि संसारसुखाचा अनुभवही घेतलेला नाही, मी कशी हत्या करू शकेन?'९४. ती शबरी म्हणाली, 'ह्या नाशिवंत शरीराचा हा मिथ्या मोह आहे. ज्याने चिरंतन स्वरूपाची प्राप्ती होईल असे कांही करा. शिवाय ह्या शरीराविषयीचे परकेपण मनातून काढून टाका. हे घटाप्रमाणे इंद्रियगोचर स्थूल शरीर तुमचे हक्काचे अर्धांग आहे.' आपल्या पत्नीचे ते सयुक्तिक बोलणे त्याला पटले. 'ठीक तर! तसेच करतो,' असे म्हणून त्याने तिला घरात कोंडून घातले आणि घरासहित तिला जाळून टाकले. मग ते भस्म घेऊन नित्याप्रमाणे पूजा केली. प्रसाद घेताना नेहमीच्या संवयीने त्याने आपल्या प्रिय पत्नीला हाक मारली.९६.

**दग्धापि साह्वानत आप पूर्ववत् तां सद्म चालोक्य स शङ्कितोऽब्रवीत् ।**
**दग्धापि गेहेन सहागता कथं सुप्तोत्थितास्मीति शबर्युवाच तम् ।।९७।।**
**शम्भुप्रभावोऽस्त्विवति तेन भाषिते द्राक्प्रादुरासीन्निजरूपधृक् शिवः ।**
**दौष्कुल्यदोषं परिहृत्य दर्शनात् ताभ्यां शिवोऽदादुभयत्र काङ्क्षितम् ।।९८।।**
**भक्तेः प्रभावोऽयमियान्न किञ्चित् फलत्यृते भक्तिमतोऽस्य सिद्ध्येत् ।**
**भक्त्येष्टमित्याह स तान्कदाचिद् गच्छन्प्रभुः स्नातुममुं ददर्श ।।९९।।**

सा दग्धा अपि आह्वानतः पूर्ववत् आप। तां, सद्मं च आलोक्य सः शङ्कितः अब्रवीत्। 'गेहेन सह दग्धा अपि कथं आगता?' शबरी तं उवाच, 'सुप्ता उत्थिता अस्मि' इति।९७। 'शम्भु+प्रभावः अस्तु' इति तेन भाषिते, द्राक् शिवः निज+रूप+धृक् प्रादुरासीत्। दर्शनात् दौष्कुल्य+दोषं परिहृत्य ताभ्यां शिवः उभयत्र काङ्क्षितं अदात्।९८। 'अयं इयान् भक्तेः प्रभावम्। भक्तिं ऋते किञ्चित् (अपि) न फलति। अतः अस्य भक्त्या इष्टं सिद्ध्येत्' इति सः तान् आह। कदाचित् प्रभुः स्नातुं गच्छन् अमुं ददर्श।९९।

ती जळून गेलेली असूनही हाकेसरशी आली. तिला पाहून चकित झालेल्या शबराने पाहिले तर घरही पूर्ववत् झालेले. त्याने आश्चर्याने तिला विचारले, 'तू तर जळाली होतीस, मग कशी आलीस?' ती उत्तरली, 'मी तर झोपले होते. तुमच्या हाकेने जागी झाले.'९७. 'ही त्या शंभूचीच कृपा,' असे तो शबर म्हणत असतानाच भगवान् शंकर आपल्या सगुण रूपाने प्रकट झाले. आपल्या दर्शनाने त्यांनी त्या दंपतीचा कुलहीनतेचा दोष दूर केला आणि त्यांना ऐहिक आणि पारलौकिक वैभव अर्पण केले.९८. श्रीगुरू म्हणतात, 'हा असा भक्तीचा प्रभाव आहे! भक्तीविना किंचित् सुद्धा फळ लाभत नाही. म्हणून ह्या ब्राह्मणाचे इष्ट त्याला त्याच्या भक्तीनेच मिळेल,' असे त्या लोकांना त्यांनी सांगितले. पुढे एकदां श्रीगुरू स्नानासाठी संगमावर जात असता त्यांनी त्या ब्राह्मणाला पाहिले.९९.

**तं तादृशं प्रेक्ष्य कमण्डलुस्थ-क्षीरेण तत्प्रोक्ष्य स शुष्ककाष्ठम् ।**
**ददर्श सद्दिव्यदृशा तदेध्मे सद्योङ्कुरा भूरिश आविरासन् ।।१००।।**
**दिव्यं स्वधामाङ्कुरितं च काष्ठमदृष्टकुष्ठोऽग्रत आस्थितं तम् ।**
**दृष्ट्वा स काष्ठार्पितदृष्टिमीशं तुष्टाव सत्प्रेमभरानताङ्गः ।।१०१।।**

तादृशं तं प्रेक्ष्य सः कमण्डलुस्थ क्षीरेण तत् शुष्क+काष्ठं प्रोक्ष्य सत+्दिव्य+दृशा ददर्श। तदा इध्मे भूरिशः अङ्कुराः आविरासन्।१००। अदृष्ट+कुष्ठः,दिव्यं स्वधाम, अङ्कुरितं च काष्ठं, अग्रतः आस्थितं तं दृष्ट्वा सः ॑ सत्+प्रेम+भर+आनत+अङ्गः काष्ठ+अर्पित+दृष्टिं ईशं तुष्टाव।१०१।

त्याला तसे दृढ भक्तीने लाकडाला पाणी घालताना पाहून श्रीगुरूंनी आपल्या कमं डलूतले पाणी त्या सुक्या लाकडावर शिंपडले आणि आपल्या संजीवन दिव्यदृष्टीने पाहिले. तो काय, ते काष्ठ भरपूर पालवीने बहरून गेलेले!१००.

त्याच वेळी त्या ब्राह्मणाचे कुष्ठ निघून गेले आणि त्याचा देह सुवर्ण झाला. ती औदुंबराची कोवळी पाने आणि आपली कांतियुक्त काया पाहून आनंदाने, कृतज्ञतेने आणि सात्त्विक प्रेमभराने झुकलेल्या देहाने नरहरी सद्गदित कंठाने काष्ठावर दृष्टी असलेल्या श्रीगुरूंना उद्देशून पुढील उत्स्फूर्त स्तोत्र गाऊ लागला (हे उपजाती वृत्तांतील अष्टक आहे).१०१.

**कोट्यर्कभं कोटिसुचन्द्रशान्तं विश्वाश्रयं देवगणार्चिताङ्घ्रिम् ।**
**भक्तप्रियं त्वात्रिसुतं वरेण्यं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०२।।**
**मायातमोऽर्कं विगुणं गुणाढ्यं श्रीवल्लभं स्वीकृतभिक्षुवेषम् ।**
**सद्भक्तसेव्यं वरदं वरिष्ठं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०३।।**

कोटि+अर्क+भं कोटि+सुचन्द्र+शान्तं विश्व+आश्रयं देव+गण+अर्चित+अङ्घ्रिं भक्त+प्रियं वरेण्यं त्वां अत्रिसुतं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।२। माया+तमः अर्कं, विगुणं गुण+आढ्यं, श्रीवल्लभं, स्वीकृत+भिक्षु+वेषं, सत्+भक्त+सेव्यं, वरदं वरिष्ठं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।३।

कोटी सूर्यांसारखा तेजस्वी असूनही जो कोटी चंद्राप्रमाणे शांत (आल्हादक) आहे, ज्याच्या अधिष्ठानावर हे विश्व स्थिरावले आहे, देवांचे समूह ज्याच्या चरणांची पूजा करीत आहेत, भक्तांना प्रिय असणाऱ्या, निरतिशयानंदरूप, साक्षात् अत्रिनंदन दत्तात्रेयच अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!२. विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत (६:१२५) सांगितल्याप्रमाणे तमोरूप असलेल्या मायेचा (*माया चेयं तमोरूपा*) निरास करणारा जो सूर्य आहे, सर्व गुणांचा आकर असूनही जो गुणातीत आहे, प्रत्यक्ष लक्ष्मीचा पती असूनही ज्याने संन्यासी वेष धारण केला आहे, सद्भक्तांना सेवनीय अशा वरदात्या श्रेष्ठ नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!३.

**कामादिषण्मत्तगजाङ्कुशं त्वामानन्दकन्दं परतत्त्वरूपम् ।**
**सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०४।।**
**सूर्येन्दुगुं सज्जनकामधेनुं मृषोद्यपञ्चात्मकविश्वमस्मात् ।**
**उदेति यस्मिन्रमतेऽस्तमेति वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०५।।**
**रक्ताब्जपत्रायतकान्तनेत्रं सद्दण्डकुण्डीपरिहापिताघम् ।**
**श्रितस्मितज्योत्स्नमुखेन्दुशोभं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०६।।**

कामादि+षट्+मत्त+गज+अङ्कुशं आनन्द+कन्दं पर+तत्त्व+रूपं, सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारं, त्वां वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।४। सूर्य+इन्दु+गुं, सत्+जन+काम+धेनुं, मृषोद्य+पञ्चात्मक+विश्वं अस्मात् उदेति, यस्मिन् रमते, अस्तं एति वन्दे, (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।५। रक्त+अब्ज+पत्र+आयत+कान्त+नेत्रं, सत्+दण्ड+कुण्डी+परिहापित+अघं, श्रित+स्मित+ज्योत्स्न+मुख+इन्दु+शोभं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।६।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर या माजलेल्या हत्तींना आवरणारा अंकुश असा आनंदाचा कंद - म्हणजेच आनंदवल्लीत वर्णिलेल्या मानुष आनंदापासून प्रजापतीच्या आनंदापर्यंतच्या सर्व आनंदांचा स्रोत (*यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसत।* ऋग्वेद संहिता ९:११३:११), परमतत्त्वस्वरूप निरुपाधिक ब्रह्मस्वरूपी, साधू आणि धर्म यांच्या रक्षणाकरिता अवतरलेल्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!४. सूर्य आणि चंद्र ज्याचे डोळे आहेत, सद्भक्तांसाठी जो कामधेनू आहे, हे मिथ्याभूत पाचभौतिक जग ज्या अभिन्ननिमित्तोपादान कारणापासून, दोरीवर सर्प भासावा, तसे उगवते, ज्याच्यात विलसते आणि ज्याच्यात पुनः पाण्यात बुडबुडे विरावे तसे मावळते त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!५. लाल कमळाच्या पानासारखे आकर्ण विशाल नेत्र असलेल्या, आपल्या सात्त्विक दंड आणि कमंडलू यांनी भक्तांची पापे पळवून लावणाऱ्या, ज्याचा मुखचंद्रमा स्मितरूपी चांदण्याने उजळला आहे अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!६.

**नित्यं त्रयीमृग्यपदाब्जधूलिं निनादसद्बिन्दुकलास्वरूपं ।**
**त्रितापतप्ताश्रितकल्पवृक्षं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०७।।**
**दैन्याधिभीकष्टदवाग्निमीड्यं योगाष्टकज्ञानसमर्पणोत्कम् ।**
**कृष्णानदीपञ्चसरिद्युतिस्थं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०८।।**
**अनादिमध्यान्तमनन्तशक्तिमतर्क्यभावं परमात्मसंज्ञं ।**
**व्यतीतवाग्हृत्पथमद्वितीयं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०९।।**

नित्यं त्रयी+मृग्य+पद+अब्ज+धूलिं, निनाद+सत+्बिन्दु+कला+स्वरूपं, त्रि+ताप+तप्त+आश्रित+कल्पवृक्षं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।७। दैन्य+आधि+भी+कष्ट+दव+अग्निं, ईड्यं, योग+अष्टक+ज्ञान+समर्पण+उत्कं, कृष्णा+पञ्च+सरित्+युति+स्थं वन्दे। (हे)नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।८। अन्+आदि+मध्य+अन्तं, अनन्त+शक्तिं अतर्क्य+भावं, परमात्म+संज्ञं, व्यतीत+वाक्+हृत्+पथं, अद्वितीयं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।१०९।

वेदांची त्रयी (ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद) सतत ज्या नित्य पुरुषाच्या चरणकमलांच्या धुळीचा मागोवा घेत असते (पण जिला ती गवसत नाही), नाद, बिन्दू आणि कला या स्वरूपांत योगिजन ज्याचे ध्यान करतात, संसाराच्या आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक तापांनी पोळलेले ज्या कल्पवृक्षाचा आसरा घेतात त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०७. जो दारिद्र्य, मनस्ताप, भय आणि क्लेश यांच्या वनांना जाळणारा अग्नी आहे, जो सर्वांना स्तुत्य आहे, जो (भक्तांना, साधकांना आणि यतींना) अष्टांग योगाचे ज्ञान समर्पण करण्यास सदैव उत्सुक असतो, अशा कृष्णा आणि पंचनदी यांच्या संगमावर निवसणाऱ्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०८. ज्याला ना आदि आहे, ना मध्य ना अंत, ज्याच्या सामर्थ्याला सीमाच नाही, ज्याचा भाव (अभिप्राय) अतर्क्य आहे, ज्याला परमात्मा म्हणतात आणि जो वाचा आणि मन आणि यांच्या आवाक्याबाहेर आहे त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर! **वाग्हृत्पथम्** याऐवजी **वाग्दृक्पथम्** असाही पाठ आहे.१०९.

**स्तोत्रे क्व ते मेऽस्त्युरुगाय शक्तिश् चतुर्मुखो वै विमुखोऽत्र जातः ।**
**स्तुवन्द्विजिह्वोऽभवदीश्वर त्वां सहस्रवक्त्रश्चकितोऽपि वेदः ।।११०।।**
**स्तुत्वैवं प्रणतीश्चक्रे तमाश्वास्याब्रवीद्विभुः । मत्प्रसादान्महत्त्वश्री-कीर्तिसत्पुत्रवान्भव ।।१११।।**
**शिष्योत्तम त्वं योगज्ञो भविष्यसि कुलं च ते । त्वद्वद्भविष्यत्यानीय वधूं तिष्ठ ध्रुवं त्विह ।।११२।।**
**तथेत्युक्त्वा द्विजो भार्यामानीय स तया सह । तत्र तस्थौ ततो लेभे पुत्रान्पुत्रीं स सत्तमान् ।।११३।।**
**विद्यासरस्वतीमन्त्रं गुरुदत्तं जपन्वरम् । भेजे गुरुं भवासक्तो जीवन्मुक्तोऽभवद् द्विजः ।।११४।।**

(हे) उरु+गाय ते स्तोत्रे मे क्व शक्तिः? अत्र चतुर्मुखः वै विमुखः जातः। (हे) ईश्वर, त्वां स्तुवन् सहस्र+वक्त्रः द्वि+जिव्हः अभवत्। वेदः अपि चकितः।११०। एवं स्तुत्वा प्रणतीः चक्रे। विभुः तं आश्वास्य अब्रवीत्। 'मत् प्रसादात् महत्त्व+श्री+कीर्ति+सत्पुत्र+वान् भव। (हे) शिष्य+उत्तम, त्वं योगज्ञः भविष्यसि। ते कुलं च त्वत्+वत् भविष्यति। वधूं आनीय इह तु ध्रुवं तिष्ठ।'१११-१२। द्विजः 'तथा' इति उक्त्वा भार्यां आनीय तया सह सः तत्र तस्थौ। ततः सः सत्तमान् पुत्रान् पुत्रीन् लेभे। गुरुदत्तं वरं विद्या+सरस्वती+मन्त्रं जपन् गुरुं भेजे। द्विजः भव+असक्तः जीवन्+मुक्तः अभवत्।११३-१४।

हे प्रभो, आपली कीर्ती थोरामोठ्यांनी गाइली आहे. मला एवढे सामर्थ्य कुठे आहे? ब्रह्मदेव चार मुखांनी आपले यश गाऊन थकला. हजार मुखांच्या शेषाच्याही जिभा तुला स्तवून फाटल्या. वेदही (नेति नेति म्हणत) स्तंभित झाले, तर आपल्या स्तवनाला माझी शक्ती कशी पुरी पडेल?११०.

अशी स्तुती करून त्या ब्राह्मणाने श्रीगुरूंना लोटांगणे घातली. प्रभू त्याला आश्वासन देत म्हणाले, 'माझ्या कृपाप्रसादाने तुला मोठेपण, संपत्ती, कीर्ती आणि सत्पुत्रांचा लाभ होईल. तुझा वंशही तुझ्यासारखाच होईल. आता तू आपल्या पत्नीला घेऊन ये आणि इथे गाणगापुरातच कायम राहा.'१११-१२. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो नरहरी ब्राह्मण पत्नीला घेऊन येऊन गाणगापुरातच राहिला. पुढे त्याला उत्तम पुत्र आणि कन्या झाले. श्रीगुरूंनी दिलेल्या श्रेष्ठ विद्यासरस्वती मंत्राचा जप करीत तो गुरूंची भक्ती करीत राहिला. त्या गुरुभजनाच्या प्रभावाने तो संसारातून विरक्त होऊन जीवन्मुक्त झाला.११३-१४.

**तत्कुलं चापि तत्तुल्यं तद्भक्तिमहिमा त्वियान् । त्वत्पूर्वजोऽपि तत्तुल्यस् तस्मात्ते मतिरीदृशी ।।१५।।**
**सद्गुरोस्तु प्रसादोऽयं भविष्यत्यपि ते कुले । वर्धमानः सदैवेति संविन्मे ब्राह्मण ध्रुवा ।।११६।।**

**।। इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिमहिमावर्णनं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

**।। आदित एकोनविंशोऽध्यायः ।।**

**सप्ताहपारायणे पञ्चमः । अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिनारम्भे गुरुस्तुतिः ।**

तत् कुलं अपि तत् तुल्यम्। इयान् तत्+भक्ति+महिमा। त्वत्+पूर्वजः अपि तत्+तुल्यः। तस्मात् ते ईदृशी मतिः।१५। (हे) ब्राह्मण, अयं सद्गुरोः सदा एव वर्धमानः प्रसादः तु, ते कुले अपि भविष्यति इति मे ध्रुवा संवित्।११६।

मुंडकोपनिषदाच्या वचनाप्रमाणे (*न अस्याऽब्रह्मवित्कुले।* ३:२:९), त्याचे वंशजही त्याच्यासारखे गुरुभक्त झाले. असा श्रीगुरूंच्या भक्तीचा महिमा आहे. तुझे पणजोबाही त्या नरहरीसारखेच होते. म्हणून तर तुझी बुद्धी अशी गुरुभजनप्रवण आहे. अरे नामधारका, हा सद्गुरूंचा सतत वर्धिष्णु कृपाप्रसाद तुझ्याही वंशावरही राहणार आहे अशी ग्वाही माझे मन देत आहे.११५-१६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पहिला आणि प्रथमपासून एकूणविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ विंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**को मत्पूर्वः कथं तेन सेवितो भगवान्प्रभुः । यत्प्रभावान्ममेदृग्धीस् तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**प्रागुक्तं यवनात् त्रातः सायंदेव इति प्रिय । पूर्वः स एव तेऽश्रौषीद्गुरुं गन्धर्वपूःस्थितम् ।।२।।**
**तत्रैत्य प्रणतो विप्रो मठे दृष्ट्वा परात्परम् । नत्वा दण्डवदस्तौषीदुपसंगृह्य पद्द्वयम् ।।३।।**
**परमात्मन्परञ्ज्योतिः श्रीनृसिंहसरस्वति । भक्तेश श्रुतिचिन्त्यं ते सर्वतीर्थाश्रयं पदम् ।।४।।**

नामधारक उवाच। यत् प्रभावात् मम ईदृक् धीः कः मत्+पूर्वः? तेन कथं भगवान् प्रभुः सेवितः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।१। सिद्ध उवाच। (हे) प्रिय, प्राक् यवनात् सायंदेवः त्रातः इति उक्तम्। सः एव ते पूर्वः गुरुं गन्धर्वपुरं स्थितं अश्रौषीत्।२। प्रणतः विप्रः तत्र एत्य परात्परं दृष्ट्वा दण्डवत् नत्वा पद्+द्वयं उपसंगृह्य अस्तौषीत्।३। (हे) परमात्मन्, परंज्योतिः, श्रीनृसिंहसरस्वति, भक्तेश श्रुति+चिन्त्यं ते पदं सर्व+तीर्थ+आश्रयम्।४।

*विसाव्यांत परीक्षूनि सायंदेवावरि प्रसाद करिती। श्रीगुरु काशीयात्रा तसे अनंतव्रत निरूपिती।।१।।* नामधारकाने विचारले, ‘आपण ज्या माझ्या पूर्वजामुळे माझी अशी सद्बुद्धी झाली म्हणता तो कोण? त्याने सद्गुरू भगवानांची कशा प्रकारे सेवा केली? हे ऐकण्यास मी सादर आहे.१. सिद्ध म्हणतात, ‘मागे नवव्या अध्यायात ज्या सायंदेवाचे यवनापासून रक्षण केले असे सांगितले, त्याच तुझ्या पूर्वजाच्या कानांवर श्रीगुरू गाणगापुरी राहिले आहेत ही वार्ता पडली.२. तेव्हा तो विनीत ब्राह्मण गाणगापूरला आला आणि परमश्रेष्ठ सद्गुरूंना पाहून दंडवत घालून भावभराने त्यांचे पाय धरून स्तुती करू लागला.’३. ‘परमात्मस्वरूपी सद्गुरो, आपण सूर्यादि तेजोमयांचेही प्रकाशक आहा. भक्तांचे स्वामी श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराज, आपले वेदांनी ध्याइलेले पाय सर्व तीर्थांना आश्रयभूत आहेत.४.

**न मर्त्यस्त्वं महेशोऽसि त्र्य्यात्मा मानवाकृतिः । प्राणदानक्षमाम्ब्वाढ्य-कमण्डलुकरोऽसि कः ।।५।।**
**दुष्टनिग्रहसद्रक्षा-क्षमदण्डकरोऽस्यजः । शिवोऽसि मुक्तिदः पाप-तापनाशक्षमोग्रदृक् ।।६।।**
**मृतो जीवितो येन दुग्धा लुलायी वशा शुष्ककाष्ठं तरुत्वं प्रणीतम् ।**
**क्षणादन्त्यजोऽप्युद्धृतस्तेऽनुभावं क्षितौ कोऽर्हति ज्ञातुमन्यत्तवापि ।।७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**स्तुत्यानयास्मि ते विप्र भृशं तोषमुपागतः । भूयात्ते वंशमात्रस्य श्रद्धाभक्तिर्मयि ध्रुवा ।।८।।**

त्वं मर्त्यः न। त्रयी+आत्मा मानव+आकृति महेशः असि। प्राण+दान+क्षम+अम्ब+आढ्य+कमण्डलु+करः कः असि।५। दुष्ट+निग्रह+सत्+रक्षा+क्षम+दण्ड+करः अजः असि। मुक्तिदः पाप+ताप+नाश+क्षम+उग्र+दृक् शिवः असि।६। 'येन मृतः जीवितः, वशा लुलायी दुग्धा, शुष्क+काष्ठं तरुत्वं प्रणीतं, अन्त्यजः अपि क्षणात् उद्धृतः, ते अनुभावं क्षितौ कः अपि ज्ञातुं अर्हति?'।७। श्रीगुरुः उवाच। '(हे) विप्र, अनया स्तुत्या भृशं तोषं उपागतः अस्मि। ते वंशमात्रस्य मयि ध्रुवा श्रद्धाभक्तिः भूयात्।८।

आपण मर्त्य मानव नाहीत तर मानवाचे रूप घेतलेले त्रयमूर्ती महेश आहात. प्राणदानाचे सामर्थ्य असलेल्या जलाने भरलेले कमंडलू हाती धरलेले ब्रह्मदेव (**कः**) आपण आहा.'५. दुष्टांचा निग्रह आणि सज्जनांचे रक्षण करण्याची क्षमता असलेला दंड धारण केलेले भगवान् विष्णू आपणच आहात. पाप आणि ताप यांचा नाश करण्याची शक्ती असलेल्या उग्र दृष्टीचे मुक्तिदायक भगवान शंकर आपण आहा.६. 'ज्यांनी मृताचेही संजीवन केले, वांझ महिषी दुभविली, वाळल्या काष्ठाचा बहरलेला वृक्ष केला, क्षणभरांत अंत्यजाचाही उद्धार केला, त्या आपले सामर्थ्य ह्या भूतलावर कोण जाणण्याजोगा आहे?'७. श्रीगुरू म्हणाले, 'ब्राह्मणा, ह्या तुझ्या स्तुतीने मी खूप प्रसन्न झालो आहे. तुझ्या वंशांतील सर्वांची माझ्यावर स्थिर श्रद्धा आणि भक्ती राहील.८.

**कच्चित्क्षेमं युवत्यादेस् तव ब्रूहि क्व तिष्ठसि । कालेन बहुना विप्र संगतोऽस्यद्य मत्प्रिय ।।९।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ भगवन्त्वत्प्रसादतः । सर्वेषां क्षेममस्तीश काञ्च्यां तिष्ठाम्यहं स्वकैः ।।१०।।**
**योगक्षेमेक्षका भ्रातृ-पुत्रा मे तेऽनुकम्पया । त्वत्पादाब्जरसं पातुमलिप्रायोऽस्मि सम्प्रति ।।११।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कष्टं मे सेवनं नाज्ञ कोऽपि ज्ञातुं न शक्यते । ग्रामे नदीतटेऽरण्ये दुर्गमेऽपि वसाम्यहम् ।।१२।।**

तव युवत्यादेः कच्चित् क्षेमं (अस्ति)? क्व तिष्ठसि? ब्रूहि। (हे) विप्र, मत्+प्रिय, बहुना कालेन अद्य संगतः असि।'९। सायंदेव उवाच। '(हे) देवदेव, जगत्+नाथ, भगवन् त्वत्+प्रसादात् सर्वेषां क्षेमं अस्ति। (हे) ईश अहं स्वकैः काञ्च्यां तिष्ठामि।१०। मे भ्रातृ+पुत्राः ते अनुकम्पया योग+क्षेम+ईक्षकाः। सम्प्रति त्वत्+पाद+अब्ज+रसं पातुं अलिप्रायः अस्मि।'११। श्रीगुरुः उवाच (हे) न+अज्ञ , मे सेवनं कष्टं कः अपि ज्ञातुं न शक्यते। अहं ग्रामे, नदी+तटे, अरण्ये, दुर्गमे अपि वसामि।१२।

तुझी पत्नी आणि सर्व कुटुंबीयांचे क्षेमकुशल आहे ना? आणि तू कुठे राहतोस? मला सर्व सांग बरे! माझ्या प्रिय ब्राह्मणा, किती दिवसांनी तू आज भेटतो आहेस?'९. सायंदेव उत्तरला, 'देवाधिदेवा, जगन्नाथा, भगवंता, आपल्या प्रसादाने माझे बंधुवर्ग आणि पुत्र यांचा योगक्षेम चांगला चालला आहे. आत्ता मी आपल्या पदकमलांच्या मकरंदाचे पान करण्यासाठी भ्रमर होऊन आलो आहे.'११. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'माझी सेवा किती कठीण आहे तुला कळत नाही असे नाही. अरे कुणालाही - देवादिकांनाही, ते कळणे शक्य नाही. मी कधी गावात राहतो, तर कधी नदीकिनारी, कधी अरण्यात तर कधी आणखी दुर्गम ठिकाणी!'१२.

**तच्छुत्वा सोऽनुयास्यामि यत्र क्वापीत्थमाददे । तथेत्युक्त्वैकदा शम्भुस् तेनागात्सह संगमम् ॥१३॥**
**निवार्यान्यान्समं तेन स्थित्वाश्वत्थतले निशि । वृष्ट्यै तदादिदेशाब्दमकालेऽपि परीक्षितुम् ॥१४॥**
**गर्जिताब्दो ववर्षारं झञ्झावातसखस्तदा । क्षणप्रभापि मुष्णन्ती दृष्टिमासीदनुक्षणम् ॥१५॥**
**उपर्युपरि वस्त्रैस्तं समन्तात्स प्रकम्पितम् । सहिष्णुः श्रीगुरुं भेज आसारार्तिरणद् द्विजः ॥१६॥**
**यामाभ्यां खण्डितं वर्षं दृष्ट्वोचे तं गुरुः पुरम । गत्वाग्निमानयात्यन्तं क्लिन्नाङ्गे शीतमुत्थितम् ॥१७॥**

तत् श्रुत्वा सः 'यत्र क्व अपि अनुयास्यामि' इत्थं आददे। 'तथा' इति उक्त्वा शम्भुः तेन सह संगमं अगात्।१३। निशि अन्यान् निवार्य तेन समं अश्वत्थ+तले स्थित्वा तदा (तं) परीक्षितुं अकाले अपि अब्दं वृष्ट्यै आदिदेश।१४। तदा झंझावात+सखः गर्जित+अब्दः अरं ववर्ष। क्षणप्रभा अपि अनुक्षणं दृष्टिं मुष्णन्ती आसीत्।१५। सः आसार+आर्ति+रणत्+द्विजः सहिष्णुः उपरि+उपरि वस्त्रैः प्रकम्पितं गुरुं भेजे।१६। वर्षं यामाभ्यां खण्डितं दृष्ट्वा गुरुः तं ऊचे। क्लिन्न+अङ्गे अत्यंतं शीतं उत्थितम्। पुरं गत्वा अग्निं आनय।१७।

त्यावर 'आपण जिथे कुठे जाल तिथे मी आपल्या मागे येईन,' असे त्याने अंगीकारले. 'ठीक आहे,' असे म्हणून श्रीगुरू एकदा त्याच्याबरोबर संगमावर गेले.१३. रात्री इतर सर्वांना पाठवून फक्त सायंदेवालाच ठेवून त्यांनी मेघाला अकालीच वर्षा करण्याचा आदेश दिला.१४. तेव्हा झंझावातासह गरजणारे मेघ धो धो कोसळू लागले. क्षणोक्षणी डोळे दिपवणारी वीजही (**क्षणप्रभा**) चमकू लागली.१५. भिजून चिंब झाालेल्या सायंदेवाचे दात वाजू लागले. ते सर्व सहन करीत त्या ब्राह्मणाने थरथरणाऱ्या श्रीगुरूंच्यावर वस्त्रे धरून त्यांची सेवा केली.१६. दोन प्रहरांनी पाऊस ओसरल्याचे पाहून श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंग चिंब भिजले आहे आणि थंडी फार वाजते आहे. गावात जाऊन विस्तव आण. मात्र जाताना इकडे तिकडे कुठे पाहू नकोस आणि माझे चिंतन करीत जा.'१७.

**कुत्रापीततस्ततोऽपश्यन् याहि मामनुचिन्तयन् । तच्छ्रुत्वागात्स करक-चूर्णिताङ्गोपि शीकरैः ॥१८॥**
**क्लेदितात्माप्यनुध्यायन् चञ्चलातेजसोऽयनम् । प्रविश्य गोपुराद् द्वाःस्थ-दत्तमार्गः पुरं स तु ॥१९॥**
**गृहीतभाजनन्यस्त-वह्निः शीघ्रं न्यवर्तत । ज्ञातुं गुरूक्तिहेतुं स व्यधाद् दृष्टिमितस्ततः ॥२०॥**
**पार्श्वद्वयतलस्थोग्र-सर्पौ दृष्ट्वाऽगमज्जवात् । दृष्ट्वानुयातावपि तौ भीतो दध्यौ हरेः पदम् ॥२१॥**
**तदोच्चैः सङ्गमे वेद-ध्वनिं श्रुत्वा विलोक्य च । द्योतं भ्रान्तो द्रुतं प्राप्य दृष्ट्वैकं स्वगतं द्विजः ॥२२॥**
**कैः कृतोऽयं ध्वनिर्द्योतः क्वेत्यभूच्छङ्कितः स तम् । भीतं प्राह गुरुर्मा भीस्त्वद्गुप्त्यै तौ प्रचोदितौ ॥२३॥**

इतः ततः कुत्र अपि अपश्यन् मां अनुचिन्तयन् याहि। तत् श्रुत्वा करक+चूर्णित+अङ्गः अपि शीकरैः क्लेदित+आत्मा अपि सः चञ्चला+तेजसः अयनं अनुध्यायन् अगात्। गोपुरात् द्वाः+स्थ+दत्त+मार्गः पुरं प्रविश्य तु सः गृहीत+भाजन+न्यस्त+वह्निः शीघ्रं न्यवर्ततत। सः गुरु+उक्ति+हेतुं ज्ञातुं दृष्टिं इतस्ततः व्यधात्।१८-२०। पार्श्व+द्वय+तलस्थ+उग्र+सर्पौ दृष्ट्वा जवात् अगमत्। तौ अपि अनुयातौ दृष्ट्वा भीतः हरेः पदं दध्यौ।२१। तदा सङ्गमे उच्चैः वेदध्वनिं श्रुत्वा द्योतं च विलोक्य भ्रान्तः द्रुतं प्राप्य एकं (गुरुं) दृष्ट्वा द्विजः स्वगतं, 'कैः अयं ध्वनिः कृतः ? क्व द्योत ?' इति शङ्कितः अभूत्। सः गुरुः तं भीतं प्राह, 'मा भीः। तौ त्वत्+गुप्त्यै प्रचोदितौ'।२२-२३।

ते ऐकून गारांचा मार खात आणि पावसाच्या रिमझिमीत भिजत तो त्या अंधाऱ्या रात्री विजेच्या प्रकाशाने रस्ता निरखीत निघाला.१८. गोपुरात द्वारपालांनी वाट दिल्यावर तो गाणगापुरात प्रवेशला आणि एका भांड्यात विस्तव घेऊन घाईने परतला. येतांना गुरूंनी इकडे तिकडे न पाहायला का सांगितले म्हणून त्याने दोन्ही बाजूंना दृष्टी टाकली.१९-२०. आपल्या दोन्ही बाजूंना दोन भयंकर साप येताना पाहून तो घाबरून पळू लागला. तरीही ते साप आपल्या मागेच येत असलेले पाहून भीतीने तो श्रीगुरूंच्या पायांचे ध्यान करू लागला. तेव्हा त्याला संगमाकडून मोठा वेदध्वनी ऐकायला आला आणि खूप प्रकाशही दिसला. त्वरेने येऊन पाहता त्याला फक्त एकटे श्रीगुरूच दिसले.२१. तो 'हा आवाज कुणी केला आणि प्रकाश कुठला ?' अशा विचाराने गोंधळून गेला. त्याला तसा घाबरलेला पाहून श्रीगुरू म्हणाले, 'अरे ते साप तुझ्या रक्षणासाठी पाठविले होते.'२२-२३.

**तदाप्यही गुरुं नत्वा जग्मतुस्तं प्रभुर्द्विजम् । प्राहेदृशी गुरोः सेवा मरुतामपि दुष्करा ।।२४।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भगवन्ननुकम्पाब्धे शरणागतवत्सल । सेवातत्त्वमुपाख्याहि श्रीगुरोस्तारकं परम् ।।२५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**छायौपम्येन संसेव्यो गुरुस्तत्त्वमिदं परम् । प्रार्पयेन्नियतं देहं सार्थं तस्मै परात्मदृक् ।।२६।।**
**सर्वभावेन बुद्ध्वेशं तं भजेत्तत्प्रसादभुक् । तद्ध्यानजीवनस्तत्पत् तीर्थपस्तत्कथारतिः ।।२७।।**

तदा अही अपि गुरुं नत्वा जग्मतुः। प्रभुः तं द्विजं प्राह, 'ईदृशी गुरुसेवा मरुतां अपि दुष्करा।'२४। सायंदेव उवाच। '(हे) भगवन्, अनुकम्पा+अब्धे शरण+आगत+वत्सल, परं तारकं श्रीगुरोः सेवा+तत्त्वं उपाख्याहि।'२५। श्रीगुरुः उवाच। 'गुरुः छाया+औपम्येन संसेव्यः इदं परं तत्त्वम्। पर+आत्म+दृक् तस्मै स+अर्थं देहं प्रार्पयेत्।२६। तं सर्व+भावेन ईशं बुद्ध्वा तत्+प्रसाद+भुक् तत्+ध्यान+जीवनः तत्+पत्+तीर्थ+पः तत्+कथा+रतिः तं भजेत्।'२७।

तेवढ्यात ते सापही श्रीगुरूंना वंदन करून निघून गेले. प्रभू त्या ब्राह्मणाला म्हणाले, 'अशी ही गुरुसेवा देवादिकांनाही दुष्कर आहे. तू तर माणूस आहेस.'२४. तेव्हा सायंदेवाने प्रार्थना केली, 'अहो दयासागर शरणागतवत्सल भगवंता, श्रेष्ठ तरणोपाय असलेले श्रीगुरूंच्या सेवेचे तत्त्व आपण मला समजावून सांगावे.'२५. श्रीगुरूंनी सांगायला आरंभ केला. 'माणसाची सावली जशी उठता, बसता, चालता त्याच्या बरोबर राहते त्याचप्रमाणे निरंतर गुरूंच्या सेवेत राहावे, हेच परम तत्त्व आहे. परमार्थावर दृष्टी ठेवून धनासह तनू त्याना वाहून टाकावी.'२६. सर्व भावांनी त्याला परमेश्वर मानून त्याचा प्रसाद घ्यावा, त्याच्या ध्यानात जीवन वेचावे, त्याच्या पायाचे तीर्थ घ्यावे, त्याच्या कथांतच रमावे आणि त्यालाच भजावे.२७.

**दुःसाध्येऽपि यदादिष्टं कार्ये भक्त्या तदारभेत् । आरब्धं स नयेत्सिद्धिं भीतः कालोऽप्यपैत्यतः ।।२८।।**
**शृणु गौरीशसंवादं ब्राह्मस्त्वष्टाभजद् गुरुम् । विद्यार्थी सर्वभावात्तद् दार्ढ्यं ज्ञातुं गुरुर्जगौ ।।२९।।**
**वर्षास्वापः पतन्त्यत्र प्रत्यब्जमुटजे त्वतः । रचयैकं गृहं रम्यं सुखदं नूत्नवत्सदा ।।३०।।**
**शिष्यं तदाश्रुत्य यान्तं गुरुस्त्रीः प्राह कञ्चुकम् । देहि मेऽङ्गमितं चित्रं मनोहरमकृत्रिमम् ।।३१।।**
**पुत्रोऽप्याहाङ्घ्रियोग्ये मे पादुके देहि येऽम्भसि । गर्तेऽपि यातुः सुखदे चिन्तितस्थलनायके ।।३२।।**

दुःसाध्ये अपि कार्ये यत् आदिष्टं तत् भक्त्या आरभेत्। सः आरब्धं सिद्धिं नयेत्। अस्मात् भीतः कालः अपि अपैति। अतः(?)।२८। गौरी+ईश+संवादं शृणु। ब्राह्मः त्वष्टा विद्यार्थी गुरुं सर्व+भावात् अभजत्। गुरुः तत् दार्ढ्यं ज्ञातुं जगौ।२९। 'प्रति+अब्जं वर्षासु उटजे आपः पतन्ति। अतः एकं रम्यं सुखदं सदा नूत्नवत् गृहं रचय।'३०। तदा गुरुस्त्रीः शिष्यं यातं आश्रुत्य प्राह, 'मे अङ्ग+मितं चित्रं मनोहरं अकृत्रिमं कञ्चुकं देहि।'३१। पुत्रः अपि आह, 'मे अङ्घ्रियोग्ये सुखदे चिन्तित+स्थल+नायके पादुके देहि, ये गर्ते अपि यातुः।'३२।

श्रीगुरूंनी जरी एखादे दुष्कर असे कार्य करण्याची आज्ञा केली तरी भक्तीने त्या कामाला लागावे. शिष्याने आरंभिलेले कार्य गुरू सिद्धीला नेतातच. प्रत्यक्ष काळही ह्या गुरुभक्ताला वचकून असतो, त्यामुळे मरणाचीही भीती बाळगू नये.२८. याविषयी एक शिव आणि पार्वती यांच्यांतील संवाद ऐक. ब्रह्मदेवाचा पुत्र त्वष्टा विद्या शिकण्यासाठी म्हणून सर्वभावे गुरूला भजत होता. त्याची भक्ती किती दृढ आहे ह्याची परीक्षा घेण्यासाठी गुरुजी त्याला म्हणाले, 'अरे शिष्या, दर वर्षी पावसाळ्यात आपल्या घरात पाणी गळते. तू एक सुंदर सुखदायक नेहमी नवीन राहील असे नेटके घर बांधून दे.'३०. तेव्हा तो शिष्य कामाला जातो आहे असे ऐकून गुरुपत्नी म्हणाली, 'बाळा, मला एक छानशी, न शिवलेली, कायम माझ्या अंगाला येणारी चोळी करून दे.'३१. गुरुपुत्रानेही आपली मागणी केली. 'मला माझ्या मापाच्या सुखद पादुका करून दे, ज्या खड्ड्यांतूनही जातील आणि मला हव्या त्या ठिकाणी घेऊन जातील.'३२.

**कन्याह कुण्डले दन्ति-दन्तभूतं प्रदेहि मे । लसत्क्रीडागृहं चैक-स्तम्भं पुत्तलिका अपि ॥३३॥**
**सचेतनाः सदा येषु पाकः शैत्यं न यास्यति । अनञ्जनस्पृग्भाण्डानीत्याकर्ण्य स ययौ वनम् ॥३४॥**
**अज्ञोऽस्म्यप्यत्र गुर्वर्थं मर्तव्यमिति तं वने । निर्विण्णमाययौ कश्चिदवधूतो दयार्द्रधीः ॥३५॥**
**व्यपेतभीः प्रहृष्टात्मा गुरुभावनया स तम् । उपसंगृह्य तत्तस्मै शशंस गुरुभाषितम् ॥३६॥**
**तमाश्वास्याब्रवीत्साधुः काशीक्षेत्रे त्वभीष्टदे । सति जाग्रति विश्वेशे किं केषां दुर्लभं वद ॥३७॥**

कन्या आह। मे कुण्डले, दन्ति+दन्त+भूतं लसत् एक+स्तम्भं क्रीडा+गृहं, सचेतनाः पुत्तलिकाः, अन्+अञ्जन+स्पृक् भाण्डान् येषु पाकः शैत्यं न याति, प्रदेहि। इति आकर्ण्य सः वनं ययौ।३३-३४। 'अज्ञः अस्मि। गुरु+अर्थं अत्र मर्तव्यं' इति निर्विण्णं तं कश्चित् दया+आर्द्र+धीः अवधूतः आययौ।३५। व्यपेत+भीः प्रहृष्ट+आत्मा सः तं गुरु+भावनया उपसंगृह्य तस्मै गुरु+भाषितं शशंस।३६। साधुः तं आश्वास्य अब्रवीत्। अभीष्ट+दे काशीक्षेत्रे तु विश्व+ईशे जाग्रति केषां किं दुर्लभम्, वद।३७।

तेवढ्यात गुरुकन्याही त्याला म्हणाली, 'कुंडले, हस्तीदंताचे बनवलेले एकखांबी खेळातले घर, जिवंत पुतळ्या, ज्यांना काजळी लागणार नाही आणि ज्यात स्वयंपाक थंड होणार नाही अशी भांडी, असे सर्व मला दे.' ह्या सर्वांच्या मागण्या ऐकून तो त्या पुरविण्यासाठी वनात गेला.३३-३४. 'मी तर एक अजाण बालक आहे. हे सगळे मी कुठून आणणार? इथे गुरूंच्या कामात जीव द्यावा' अशा विचाराने निराश झाला असता तिथे कुणी दयार्द्र अंतःकरणाचा एक अवधूत आला.३५. त्याला पाहून त्या त्वष्ट्याची भीती गेली आणि त्याचे मन प्रसन्न झाले. त्या अवधूताला 'हे आपले गुरूच आहेत' असे मानून त्याने त्यांचे पाय धरले आणि त्याला आपल्या गुरूंच्या आणि इतरांच्या मागण्या सांगतल्या.३६. त्या साधूंनी त्याला धीर दिला आणि म्हणाले, 'आपल्या अभीष्टाची पूर्ती करणाऱ्या काशीक्षेत्रात विश्वेश्वर सदैव जागत असता कुणाला काय दुर्लभ आहे? सांग.'३७.

**तत्रत्यपुण्यं को वेत्ति तद्वास्युद्वीक्षणादपि । अपैत्यघौघः किं वाच्यं सुखमानन्दकानने ।।३८।।**
**पुमर्थदोऽपि विश्वेशः प्राणिमात्रं मृतं क्षणात् । स तारकोपदेशेन दत्ते मुक्तिमनुक्षणम् ।।३९।।**

**।। शिष्य उवाच ।।**

**क्वास्ते काशी क्व विश्वेशो जाने स्वर्भुवि वा न तत् । प्रार्थये तारकं त्वां मे दर्शयाज्ञोऽस्मि केवलम् ।।४०।।**
**स प्राह त्वां नयाम्यद्य त्वद्योगात् क्षेत्रदर्शनम् । स्यान्मेऽप्ययत्नतो जन्म-साफल्यं यद्यदीक्षणात् ।।४१।।**
**तमादाय ततो योग-गत्या शीघ्रं महामुनिः । काशीं गत्वा क्षेत्रयात्रां यथाक्रममुपादिशत् ।।४२।।**

'तत्रत्यपुण्यं कः वेत्ति? तत्+वासी+उद्वीक्षणात् अपि अघ+ओघः अपैति। आनन्द+कानने सुखं किं वाच्यम्?'३८। 'विश्वेशः पुं+अर्थदः अपि मृतं प्राणि+मात्रं सः तारक+उपदेशेन क्षणात् अनुक्षणं मुक्तिं दत्ते।'३९। शिष्य उवाच। काशी क्व आस्ते? क्व विश्वेशः? तत् स्वः भुवि वा न जाने। त्वां (अहं) प्रार्थये, मे दर्शय, केवलं अज्ञः अस्मि।४०। ततः महा+मुनिः तं आदाय योग+गत्या शीघ्रं काशीं गत्वा यथाक्रमं काशी+यात्रां उपादिशत्।४२।

त्या काशी क्षेत्रात राहणाऱ्यांचे पुण्य कोण जाणू शकेल? काशीवासियांच्या दर्शनानेसुद्धा पापांच्या राशी नष्ट होतात. ज्याचे नावच आनंदकानन आहे त्या काशी क्षेत्रातील सुखाचे काय वर्णन करावे?३८. तिथे विश्वेश्वर पुरुषार्थ तर पुरवतातच, पण तिथे मृत्यू पावणाऱ्या प्रत्येक प्राणीमात्राला सतत तारक मंत्राचा (रामनाम किंवा ॐकार) उपदेश करून मुक्ती देत असतात. तारसार उपनिषदात आणि पुराणातही '*तारकं ब्रह्म व्याचष्टे*' असे वचन आहे.३९. शिष्याने विचारले, 'ही काशी आणि विश्वेश्वर कुठे आहेत. भूमीवरच आहेत की स्वर्गांत मला ठाऊक नाही. महाराज, मी आपल्याला प्रार्थना करतो की आपणच मला दाखवावे. मी अगदी अजाण आहे!'४०. तेव्हां ते महामुनी त्याला घेऊन योगगतीने काशीला गेले आणि त्याला क्रमशः संपूर्ण काशीयात्रेचे निरूपण केले.४२.

**विश्वेशदर्शनं चान्तर् गृहयात्रां यथाक्रमम् । दक्षिणोदङ्मानसाख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात् ।।४३।।**
**स्नानदानार्चनश्राद्ध-युक्तां यात्रां च पाक्षिकीम् । भवानीशो हरिर्धुण्डिर् दण्डपाणिश्च भैरवः ।।४४।।**
**गुहः काशी च गङ्गाद्या देवा लिङ्गानि सर्वशः । इत्यादीनां पूजनं च निवेद्य स्थापनं तथा ।।४५।।**
**स्वनामाङ्कितलिङ्गस्य कथयित्वा यथोक्तवत् । कुरु प्रसीदेद्विश्वेश इत्युक्त्वान्तर्दधे स्वयम् ।।४६।।**
**मद्भावस्य परीक्षायै गुरु रूपान्तरादयम् । प्राप्तः किलेति मत्वा स यथानिर्दिष्टमाचरत् ।।४७।।**

यथा+क्रमं विश्वेश+दर्शनं, अन्तः+गृह+यात्रां च, दक्षिण+उदक्+मानस+आख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात्..।४३। स्नान+दान+अर्चन+श्राद्ध+युक्तां पाक्षिकीं यात्रां च, भवानी, ईशो, हरिः धुण्डिः दण्डपाणिः च भैरवः,।४४। गुहः काशी च गङ्गा आद्याः देवाः सर्वशः लिङ्गानि इत्यादीनां पूजनं निवेद्य तथा..।४५। स्व+नाम+अङ्कित+लिङ्गस्य स्थापनं कथयित्वा 'यथा+उक्त+वत् कुरु, विश्वेश प्रसीदेत्' इति उक्त्वा स्वयं अन्तर्दधे।४६। सः 'अयं मत्+भावस्य परीक्षायै गुरुः रूपान्तरात् प्राप्तः किल,' इति मत्वा सः यथा+निर्दिष्टं आचरत्।४७।

क्रमशः विश्वेश्वराचे दर्शन, अंतर्गृहयात्रा, दक्षिणमानसयात्रा, उत्तरमानसयात्रा, पञ्चक्रोशीची यात्रा,(४३) स्नान, दान, पूजा, श्राद्ध यांसह शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या यात्रा, भवानी, विश्वेश्वर, विष्णू, धुण्डिराज, दण्डपाणि तसेच भैरव,(४४) गुह, काशी, गंगा इत्यादि देवांच्या आणि सर्व लिंगांची पूजा सांगून स्वतःच्या नावाचे लिंग स्थापन करण्यास सांगून, 'मी जसे सांगितले तसे सर्व कर,' असे बोलून ते महामुनी अंतर्धान पावले.४६. 'हे माझे गुरूच माझ्या भक्तीची परीक्षा घ्यायला रूप पालटून आले' असा मनाशी निश्चय करून त्या त्वष्ट्याने त्याप्रमाणे सर्व यात्रा यथासांग केल्या.४७.

**चरित्वा क्षेत्रयात्रां स लिङ्गं संस्थापयत्तदा । विश्वेशो दर्शयित्वा स्वं रूपं प्रीतोऽब्रवीदिदम् ।।४८।।**
**वत्स वत्स पवित्रोऽसि गुरुभक्त्या विशुद्धया । धन्योऽस्यनुगृहीतोऽसि वृणीष्वाभीप्सितं वरम् ।।४९।।**
**शिष्योऽपि गुरुतत्पत्नी-पुत्रोक्तीस्तं तथाब्रवीत् । कलाविद्यापटुर्भूत्वा ज्ञानविज्ञानवानिह ।।५०।।**
**प्रसार्य क्वापि चातुर्यं लोकख्यातो भविष्यसि । इत्युक्त्वान्तर्दधे विश्वेट् ततः सोऽप्यcraययौ गुरुम् ।।५१।।**
**याचिताखिलवस्तूनि श्रीविश्वेशप्रसादतः । निर्मायादात्कृती तेन गुरुस्तुष्टस्तमब्रवीत् ।।५२।।**

सः क्षेत्रयात्रां चरित्वा लिङ्गं संस्थापयत्। तदा विश्वेशः प्रीतः तं स्वं रूपं दर्शयित्वा इदं अब्रवीत्।४८। 'हे' वत्स, वत्स, विशुद्धया गुरुभक्त्या पवित्रः असि, धन्यः असि, अनुगृहीतः असि, अभीप्सितं वरं वृणीष्व।४९। शिष्यः अपि गुरु+तत्+पत्नी+पुत्र+उक्तीः तथा अब्रवीत्। 'इह कला+विद्या+पटुः, ज्ञान+विज्ञान+वान् भूत्वा,।५०। क्व अपि चातुर्यं प्रसार्य, लोकख्यातः भविष्यसि' इति उक्त्वा विश्वेट् अन्तर्दधे। ततः सः अपि गुरुं आययौ।५१। कृती श्रीविश्वेश+प्रसादतः याचित+अखिल+वस्तूनि निर्माय अदात्। तेन तुष्टः गुरुः तं अब्रवीत्।५२।

संपूर्ण क्षेत्रयात्रा करून झाल्यावर त्याने आपल्या नावाने शिवलिंगाची स्थापना केली. तेव्हा प्रत्यक्ष विश्वेश्वर प्रसन्न होऊन त्याच्यापुढे प्रकटले आणि म्हणाले,(४८) 'बाळा रे बाळा! अत्यंत शुद्ध गुरुभक्तीने तू पवित्र झाला आहेस, तू धन्य आहेस. तुझ्यावर माझा अनुग्रह आहे. तुला हवा असलेला वर तू मागून घे.'४९. शिष्यानेही त्यांना आपले गुरू, त्यांची पत्नी, पुत्र आणि कन्या यांच्या मागण्या निवेदन केल्या. तेव्हा भगवान विश्वनाथ म्हणाले, 'तू चौसष्ट कला, चौदा विद्या यात प्रवीण होशील. लौकिक आणि पारमार्थिक ज्ञानाने संपन्न होशील. भूलोकातच काय पण कुठेही स्वर्गात वा पाताळातही तू तुझ्या चातुर्याचा प्रभाव पसरवशील. तू सर्व लोकांत प्रसिद्ध होशील.' एवढे बोलून भगवान अदृश्य झाले. तो शिष्य गुरूंच्या घरी परतला.५०. अशा कृतकृत्य झालेल्या शिष्याने काशीविश्वेश्वराच्या प्रसादाने त्यांच्या सर्व मागण्यांप्रमाणे वस्तू निर्माण करून त्यांना अर्पण केल्या. त्यामुळे प्रसन्न झालेले गुरू त्याला म्हणाले.५२.

**भूत्वा ज्योतींषि यावत्त्वं चिरजीवी प्रसार्य सत् । चातुर्यं सर्वलोकेषु त्वं स्रष्टेवापरो भव ।।५३।।**
**तव सर्वर्धिनिधयो वशाश्चिंताव्यथादिकाः । न स्पृशन्ति कदापि त्वां प्रसादोऽयं मम ध्रुवः ।।५४।।**
**ततः प्रस्थापयामास तं स्वस्थानमुपेत्य सः । भूत्वा गुरूक्तवद्धयास्ते श्रीमंस्त्वष्टाखिलश्रुतः ।।५५।।**
**इति गौर्यै शिवेनोक्तं सेवातत्त्वं त्विदं गुरोः । तदुक्ताचरणं भक्त्या सर्वभावात्तदर्चनम् ।।५६।।**
**एतावदुक्त्वा विरते गुरौ द्विजो नत्वाब्रवीदद्य विचित्रमीक्षितम् ।**
**काशीपुरं वै भवता सहाखिलं यद्यत्समाख्यातमवेक्षितं समम् ।।५७।।**

'यावत् ज्योतींषि चिरजीवी त्वं सर्व+लोकेषु चातुर्यं प्रसार्य सत् त्वं अपरः स्रष्टा एव भव।५३। तव सर्व+ऋद्धि+निधयः वशाः। चिंता+व्यथा+आदिकाः त्वां कदा अपि न स्पृशन्ति। अयं मम ध्रुवः प्रसादः।५४। ततः तं प्रस्थापयामास। सः स्व+स्थानं उपेत्य गुरु+उक्तवत् भूत्वा श्रीमन् त्वष्टा अखिलश्रुतः आस्ते।'५५। इति गौर्ये शिवेन उक्तं इदं गुरोः सेवा+तत्त्वं तु तत्+उक्त+आचरणं, भक्त्या सर्व+भावात् तत् अर्चनम्।५६। एतावत् उक्त्वा गुरौ विरते द्विजः नत्वा अब्रवीत्। 'अद्य विचित्रं ईक्षितम्। भवता सह अखिलं काशीपुरं, यत् यत् समाख्यातं समं अवेक्षितम्।५७।

'तू आचंद्रसूर्य चिरंजीव होशील. त्रैलोक्यात आपल्या कौशल्याची छाप टाकून तू प्रतिब्रह्मदेवच होशील.५३. सर्व ऋद्धी, सिद्धी आणि निधी तुला वश होतील. चिंता, व्यथा आदि तुला शिवणारही नाहीत. हा माझा तुला शाश्वत प्रसाद आहे.'५४. असे बोलून गुरूंनी त्याला निरोप दिला. आपल्या स्थानी येऊन तो गुरूंच्या आशीर्वादाप्रमाणे सर्व सिद्धी पावला. त्वष्टा आजही श्रीमान् आणि सर्व लोकांत प्रख्यात आहे.५५. पार्वतीमातेला शंकरांनी सांगितलेले गुरुसेवेचे तत्त्व हेच आहे की, त्यांच्या वचनाचे पालन करून भक्तीभावाने सर्व प्रकारे त्यांचे पूजन करावे.५६. एवढे सांगून श्रीगुरू शांत राहिले. तेव्हा सायंदेव वंदन करून त्यांना म्हणाला, 'आज मी चमत्कार पाहिला! आपल्यासह मी सगळी काशी पाहिली. आपण जे जे सांगत होता ते ते सर्व मी प्रत्यक्ष पाहिले. खरोखर, कुठे काशी, कुठे मी आणि तसेच कुठे आपण? सर्व कांही पूर्वी न पाहिलेले आपण मला दाखविले!५७.

**क्वाहं क्व काशी क्व भवांस्तथापि वा अदृष्टपूर्वं सकलं प्रदर्शितम् ।**
**न त्वं नरो नासि सुरो न चेतरो नूनं परात्मैव परावरोऽस्यजः ।।५८।।**
**प्राग्ब्रह्म त्वमजोऽक्रियोऽपि बहुलं स्यामित्यभूद्धीस्तया । सृष्ट्वैवाण्डभुवं ततो जगदिदं सृष्टं सधर्मं गुणैः ।।**
**स्वैः स्वं भो रमयन्विहंसि सदरीनत्रावतीर्यानिशं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।५९।।**

क्व अहं? क्व काशी? क्व भवान् तथा अपि वा? सकलं अदृष्टपूर्वं प्रदर्शितम्! त्वं न नरः, न सुरः न च इतरः असि। नूनं पर+अवरः अजः परात्मा एव असि।'५८। प्राक् त्वं ब्रह्म अजः अक्रियः अपि बहुलं स्याम् इति धीः अभूत्। तया अण्ड+भुवं सृष्ट्वा ततः स्वैः गुणैः इदं जगत् सधर्मं सृष्टम्। स्वं रमयन् अत्र अवतीर्य अनिशं सत्+अरीन् विहंसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्री+पद+अब्ज+द्वयं वन्दे।५९।

आपण ना मनुष्य आहात, ना देव, ना आणखी कुणी! आपण ब्रह्मादिकांहून श्रेष्ठ आहात. जन्मादिविकाररहित साक्षात् परमात्माच आपण आहांत!'५८. असे बोलून त्या सायंदेवाने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. हे शार्दूलविक्रीडित वृत्तांतील अष्टक आहे. जगाची उत्पत्ती होण्यापूर्वी नित्य, शुद्ध, बुद्ध ह्या लक्षणांनी जाणले जाणारे ब्रह्म अविकारी आणि निष्क्रिय होते. त्याचा 'मी एक आहे तो बहुल (अनेक) व्हावा,' असा संकल्प झाला. आत्मा एकमेवाद्वितीय आहे. त्याला बहुलत्व कसे येणार? आत्म्यावेगळी अशी कोणतीच वस्तू असूच शकत नाही. आत्म्याचे अनेकत्व हे आकाशाच्या अनेकत्वा प्रमाणे जाणावे. आकाश एकच आहे. पण घट, मठ आदींना व्यापून ते घटाकाश, मठाकाश, महदाकाश अशा नावांनी ओळखळे जाते. म्हणजे त्याचे अनेकत्व वस्तुसापेक्ष आहे. तसेच आत्म्याचे अनेकत्वही वस्तुसापेक्षच आहे. सृष्टीतील सर्व पदार्थ सर्व अवस्थात ब्रह्मात्मकच असतात. ब्रह्मावाचून कोणत्याही वस्तूला अस्तित्व असूच शकत नाही. ब्रह्म मात्र त्या वस्तूच्या पलीकडे असते.

अनेक होण्याचा संकल्प म्हणजेच मूळमाया किंवा प्रकृती. तिच्याद्वाराच ब्रह्मदेव झाले आणि त्यांच्यापासून हे आपल्या गुणधर्मासहित जगत् उद्भवले. हे सद्गुरो, आपल्या स्वरूपापासूनच आपण कल्पिलेल्या ह्या मायामय त्रिगुणात्मक पाचभौतिक सृष्टीत अवतरून (मायेचा स्वेच्छेने अंगीकार करून) आपण सतत दुष्टांचे निर्दालन करता.

**कल्याकृष्टहृदुझ्झितक्रतुनर-त्रस्ताध्वराशीर्मुदे । प्रातः सूर्य इवोदितोऽस्यज महामोहान्धकारं ग्रसन् ।।**
**सद्धर्माश्रमसेतुमत्र शिथिलप्रायं सुदार्ढ्यं नयन् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६०।।**
**सर्वानन्दनिधानरूपममलं स त्वं सुखं मूर्तिमत् । प्रादुष्कृत्य जनत्रयान्तरमृग-क्रीडावनं पावनम् ।।**
**संसारावटमग्नमुद्धरसि भो स्वीकृत्य तुर्याश्रमम् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६१।।**

कलि+आकृष्ट+हृत्+उझ्झित+क्रतु+नर+त्रस्त अध्वर+आशीः मुदे, (हे) अज, मोह+अन्धकारं ग्रसन् प्रातः सूर्य इव उदितः असि। अत्र शिथिल+प्रायं सत्+धर्म+आश्रम+सेतुं सुदार्ढ्यं नयन् (वर्तसे)। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६०। (भो) सर्व+आनन्द+निधान, स त्वं मूर्तिमत् सुखं जन+त्रय+अन्तर+मृग+क्रीडा+वनं पावनं प्रादुष्कृत्य तुर्याश्रमं स्वीकृत्य संसार+अवट+मग्नं उद्धरसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६१।

हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. या अष्टकाची टीका लिहिताना प्रत्येक श्लोकाच्या टीकेनंतर त्याचा भावार्थ दर्शविणारा एक सुगम अनुष्टुभ् श्लोक दिला आहे. *बहु स्यामिति संकल्प्य स आद्योऽभूज्जगत्स्वयं। श्रीदत्तः शिक्षयन्दुष्टान्रमते स्वात्मना स्वयं।।१।।५९.*

अधर्माचा मित्र असलेल्या कलीकडे चित्त आकर्षिल्यामुळे मनुष्यांनी यज्ञ (विहित कर्म आणि उपासना) टाकल्याने त्रस्त झालेल्या देवतांच्या संतोषासाठी, तसेच मूल अज्ञानरूपी महामोहाचा अंधार (तम) नष्ट करण्यासाठी, आपण प्रातःकाळच्या सूर्यासारखे प्रकट झाला आहात. वर्णाश्रमधर्माची विस्कटलेली घडी बसविण्यासाठी अवतरलेल्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *नरैस्त्यक्तेषु यागेषु कलिदोषहतैरिह। देवानन्दप्रदो दत्तोऽवतीर्णो धर्मभावनः।।२।।*६०. सर्व परमानन्दाचे आगर, सुखाची गाळीव मूर्ती, मुक्त, मुमुक्षू आणि बद्ध अशा त्रिविध जनांच्या मानसरूपी मृगांचे क्रीडावन असलेले संन्यासाश्रमाश्रित पावन रूप धरून संसारगर्तेत बुडणाऱ्या जीवांचा उद्धार करणाऱ्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *सर्वानन्दनिधिर्भूत्वा यतिर्दत्तो जगत्त्रयं। पावयन्नमलो भक्तानुद्धरत्यतिकष्टतः।।३।।*६१.

**मूके गां दृशमन्धके सुतनयं वन्ध्यासु चासून्मृते । सौभाग्यं विधवासु पल्लवमहो दत्तं सुशुष्केन्धने ॥**
**एवंभूत इयान्तवैष महिमा त्रैलोक्यसंस्थाक्षमो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ॥६२॥**
**मुक्तावास मुमुक्षुकल्पविटपिन् भो कामिनां कामधुग् । दारिद्रानलमेघ दुष्कृतदवाग्रे तापिताराम ते ॥**
**श्रुत्यन्विष्टरजःपदं श्रुतविवादातीततत्त्वं महत् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ॥६३॥**

मूके गां, अन्धके दृशं, वन्ध्यासु सुतनयं, मृते असून्, विधवासु सौभाग्यं, सशुष्क+इन्धने पल्लवं दत्तम्। एवंभूत इयान् तव एष त्रैलोक्य+संस्था+क्षमः महिमा। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वर श्रीपद+अब्ज+द्वयं वन्दे।६२। भो मुक्त+आवास, मुमुक्ष+कल्प+विटपिन्, कामिनां काम+धुक्, दारिद्र+अनल+मेघ, दुष्कृत+दव+अग्ने, तापित+आराम, ते श्रुति+अन्विष्ट+रजःपदं श्रुत+विवाद+अतीत+तत्त्वं महत्। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६३।

मुक्याला वाचा, आंधळ्याला दृष्टी, वंध्येला सुपुत्र, प्रेताला प्राण, शुष्क लाकडाला पालवी देणारे आपले सामर्थ्य तर आहेच; पण त्रैलोक्याचीही स्थापना करणे आपल्याला खेळ आहे. (**अक्षम**ः म्हणजे अधिक सक्षम असा अर्थ टीकेत दिला आहे.) हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *मूकाय वाचं दृशमन्धकाय ददौ वशायै तनयं मृताय। प्राणान्सुभागं च गताधवायै शुष्कद्रुमं पल्लवयन्हि दत्तः॥४॥*६२. वर *त्रिविधजनक्रीडावन* असे म्हटले त्याचे अधिक स्पष्टीकरण या श्लोकात आहे. '*निर्दोषं हि परं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः*' या भगवद्वचनानुसार (५:१९) आपण मुक्तांचे निवास्थान आहांत. मुमुक्षूंना सद्गुरुप्राप्ती, साधनमार्ग, चित्तशुद्धी, अंतरायांचा निरास, मोक्षप्राप्तीची साधने इत्यादि पुरविणारे कल्पवृक्ष आपण आहात. बहिर्मुख भक्ताच्या कामना पुरविणारी कामधेनूही आपणच आहात. दारिद्र्यरूपी अग्नीचे शामक मेघ आपणच आहात. पातकांचे वन जाळणारे दावाग्नी आपणच आहात. संसाराच्या तापांनी पोळलेल्या जीवांचा आरामही आपणच आहात. वेदही आपल्या चरणधूलीचा मागोवा घेत आहेत. मात्र आपले व्यापक पद शास्त्रांच्या विवादापलीकडे आहे. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *चिंतामणिरिवाभाति भक्तानां भक्तियोगतः। शाास्त्रवादव्यतीतात्मा श्रीदत्तो भगवान्स्वयं॥५॥*६३.

**भो योगीश्वरभावितं तव पदं तीर्थाश्रयं सज्जना- । जीवं कामिसुदैवतं च कमलालीलास्थलं निर्मलम् ।।**
**विद्वद्वादकरण्डकं सुकृतसंस्थानं महत्पावनं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६४।।**
**वेदागोचर ते चरित्रममलं शक्तोऽत्र कः कृत्स्नशो । वक्तुं वह्न्यबिनेन्दुभूखपवनात्मेतीह मूर्त्यष्टकम् ।।**
**एतद्विश्वमयं न चान्यदिह वा ॐकाररूपेशितर्- । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६५।।**

भो, तव पदं योगि+ईश्वर+भावितं, तीर्थ+आश्रयं, सज्जन+आजीवं, कामि+सुदैवतं, कमला+लीला+स्थलं, निर्मलं, विद्वत्+वाद+करण्डकं, सुकृत+संस्थानं, महत् पावनं (अस्ति)। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६४। (हे) वेद+अगोचर, अत्र ते अमलं चरित्रं कृत्स्नशः वक्तुं कः शक्तः? हे ॐकार+रूप ईशितः वह्नि+अप्+इन+इन्दु+भू+ख+पवन+आत्मा इति इह मूर्ति+अष्टकं एतत् अयं विश्वम्। न च अन्यत् वै। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे।६५।

ते पद अनेकांच्या बुद्धीचा विषय कसे झाले आहे ते सांगतात. याज्ञवल्क्यादि योगीश्वरांनी चिंतिलेले आपले पद आहे. गंगादि तीर्थांचा आपण आश्रय. गंगा तर आपल्याच चरणापासून निःसृत झाली आहे. नारायणोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार आपल्या चरणांनी पवित्र झालेली तीर्थे महापाप्यांनासुद्धा तारतात. संतसज्जनांना तर आपले पद जीविकाभूत आहे. कामी जनांचे ते उत्तम दैवत आहे. लक्ष्मीचे ते विलासस्थान आहे. पापहारी आपले महान् पद विद्वानांच्या वादरूपी रत्नांची मंजूषा आहे. पुण्यार्जनाचे ते क्षेत्र आहे. *योगीचिंतितं लोकपावनं यत्पदं महत्। कामदं श्रीनिवासं च स दत्तः पुण्यशास्त्रभूः।।६।।*६४. (उपनिषदांव्यतिरिक्त) वेदांनाही अगम्य असणाऱ्या आपल्या पावक चरित्राचे वर्णन संपूर्णतया करण्याचे कुणाचे सामर्थ्य आहे? हे ॐकारस्वरूप ईश्वरा, अग्नी, जल, सूर्य, चंद्र, भूमी, आकाश, वायू आणि जीवात्मा ह्या आपल्या अष्टमूर्तींचेच हे जग बनलेले आहे. ह्या अष्टकाव्यतिरिक्त वेगळे असे इथे कुठेच कांहीच नाही. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *आत्माप्युपनिषद्वेद्यो यल्लीलां कोऽपि वेद नो। जगन्मयाष्टमूर्त्यात्मा स दत्तः प्रभवात्मकः।।७।।*६५.

**कुण्डीदण्डकरं प्रशान्तममलं संन्यासिरूपं तव । श्रीभीमामरजायुतिस्थितमज ध्येयं शरण्यं मयि ।।**
**ज्ञानं तारकमीश सत्यमनिशं ब्रह्मन्स्थिरीकुर्वदो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६६।।**
**एवं स्तुवन्तं प्रभुराह तेऽर्पिता । तुष्टेन भक्तिर्मयि खल्वहैतुकी ।**
**भो पुत्रपौत्रादिसमस्तवंशजा । भक्ता भविष्यन्ति ममैव निश्चितम् ।।६७।।**
**इतःपरं म्लेच्छनिषेवणं जहि । स्त्रिया सुतैश्चात्र सदैव तिष्ठ भोः ।**
**द्विजोऽपि गत्वा गृहमानयत्स्त्रियं । सुतांश्च तुष्टाव जगद्गुरुं पुनः ।।६८।।**

(हे) अज, ईश, तव अदः कुण्डी+दण्ड+करं प्रशान्तं अमलं श्रीभीमा+अमरजा+स्थितं ध्येयं, शरण्यं, ज्ञानं, तारकं, सत्यं मयि अनिशं स्थिरीकुरु। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे ।६६। एवं स्तुवन्तं प्रभुः आह, 'भो, (मया) तुष्टेन त्वयि अहैतुकी भक्तिः अर्पिता खलु। पुत्र+पौत्र+आदि समस्त+वंशजाः निश्चितं मम एव भक्ताः भविष्यन्ति।६७। इतः परं म्लेच्छ+निषेवणं जहि। भोः स्त्रिया सुतैः च अत्र एव सदैव तिष्ठ।' द्विजः अपि गृहं गत्वा स्त्रियं सुतान् च आनयत् पुनः जगत्+गुरुं तुष्टाव।६८।

परब्रह्मस्वरूप ईश्वरा, आपले दंड आणि कमंडलू धारण केलेले, ध्यानयोग्य, शरण्य, प्रशांत, ज्ञानमय भीमा-अमरजासंगमनिवासी यतिरूप नित्य माझ्या हृदयांत स्थिर करा. *संन्यासिरूपो श्रीदत्तो धृतदण्डकमण्डलुः। गन्धर्वस्थः सच्चिदात्मा सदा तिष्ठतु मे हृदि।।८।।*६६.

अशा प्रकारे स्तवन करणाऱ्या सांयदेवाला श्रीगुरू म्हणाले, 'सायंदेवा! मी तुझ्यावर प्रसन्न होऊन तुला निर्हेतुक (*मोक्षैकफला*) भक्ती प्रदान केली आहे. तुझे पुत्र, नातू आदि सर्व वंशज माझेच भक्त होतील.६७. यापुढे तू यवनांची चाकरी सोडून दे. तुझ्या बायकामुलांना घेऊन येऊन तू इथे गाणगापुरातच कायम राहा.' सायंदेवही कडगंचीला जाऊन आपल्या कुटुंबियांना घेऊन आला आणि पुनः त्याने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'हे ईश्वरा ! वाच्य (रूप) आणि वाचक (नाम) या नात्याने तू जगताला व्यापले आहेस.

**त्वं वाच्यवाचकतयेश जगन्मयो वा । ॐकारवाच्य भगवन् त्रिगुणात्मकोऽसि ।**
**आद्यन्तवर्जित पुराकृतभागधेयाद् । दृष्टं त्विदन्तव परात्परसत्त्वरूपम् ।।६९।।**
**पापोऽपि पूतोऽस्मि तवाङ्घ्रिसंश्रयात् । स्पर्शाश्रयाल्लोहमपीव काञ्चनम् ।**
**तप्तोऽपि शान्तोऽस्मि मुखेन्दुदर्शनाद् । दीनोऽपि धन्योऽस्मि तव प्रसादतः ।।७०।।**

'(हे) वाच्य+वाचकतया ईशः जगत्+मयः (हे) ॐकारवाच्य भगवन् त्रिगुण+आत्मकः असि। (हे) आदि+अन्त+वर्जित, पुरा+कृत+भागधेयात् इदं तव परात्पर+सत्त्व+रूपं दृष्टम्।६९। (अहं) पापः अपि तव अङ्घ्रि+संश्रयात् स्पर्श+आश्रयात् लोहं अपि काञ्चनं इव, पूतः अस्मि। मुख+इन्दु+दर्शनात् तप्तः अपि शान्तः अस्मि। दीनः अपि तव प्रसादतः धन्यः अस्मि।'७०।

पतंजलींच्या सूत्रानुसार (१:२७) ॐकार ज्याचे वाचक आहे अशा भगवंता, आपण त्रिगुणांचे ईश्वर आहां.' 'हेच एक अक्षर ब्रह्म आहे,' (कठ उ. १:२:१६) 'हेच श्रेष्ठ आलंबन आहे,' (१:२:१७), 'पर आणि अपर ब्रह्म म्हणजेच ॐकार' (प्रश्न उ. ५:२) इत्यादि श्रुतींनी वाच्य ब्रह्म आणि त्याचा वाचक ॐकार यांची एकरूपता प्रतिपादलेली आहे. त्याकरिता सायंदेव श्रीगुरूंना जगन्मय म्हणत आहे. नाम आणि नामी यांच्यांत भेद नसल्याने तसेच ॐकार हा ब्रह्माचा विर्वत आहे आणि ब्रह्म ॐकाराचे अधिष्ठान आहे. सांयदेव पुढे म्हणतात, 'आदि आणि अंत रहित देवा, माझ्या पूर्वपुण्याईने आपल्या ह्या श्रेष्ठातिश्रेष्ठ सत्त्वस्थ रूपाचे मला दर्शन होत आहे.६९. मी पापी असलो तरी, परीसाला लागून लोखंडाचेही सोने व्हावे तसा आपल्या चरणस्पर्शांने मी पवित्र झालो आहे. त्रिविध तापांनी पोळलेला असूनही आपल्या मुखचंद्राच्या दर्शनाने मी शांत झालो आहे. दीन असूनही मी आपल्या कृपाप्रसादाने धन्य झालो आहे.'७०.

**स्तुत्वैवं श्रीगुरुं हृष्टः कारनाटकभाषया । आवतारकथोद्धातं जगौ तस्य यथाक्रमम् ।।७१।।**
**भगवान्तेन तुष्टः सन् दत्वेष्टं वरमाह तम् । अयं ज्येष्ठसुतो मान्यो धन्यस्ते मेऽतिवल्लभः।।७२।।**
**इत्युक्त्वा नागनाथस्य मूर्ध्न्यधाच्छंकरं करम् । तदैव गीष्पतिसमो वक्ता ज्ञाता बभूव सः ।।७३।।**
**सद्गुरुः प्राह विप्रं ते भार्येयं सुभगा सती । चतुरश्चतुरान्पुत्रान् लभेत्त्वमपि भाग्यभाक् ।।७४।।**
**इतः परं म्लेच्छलब्ध-वृत्तिं हित्वा कुटुम्बयुक् । तिष्ठात्रैव तव श्रेयो भवेन्मे सुप्रसादतः ।।७५।।**
**स्नात्वा स्वकैः सह तिथौ भाद्रशुद्धचतुर्दशे । अनन्तव्रतमस्त्यद्य तारकं तत्त्वमाचर ।।७६।।**

एवं श्रीगुरुं स्तुत्वा हृष्टः कारनाटक+भाषया तस्य आवतार+कथा+उद्धातं यथा+क्रमं जगौ।७१। भगवान् तेन तुष्टः सन् तं इष्टं वरं दत्वा आह। 'अयं ज्येष्ठसुतः मान्यः धन्यः मे अतिवल्लभः।'७२। इति उक्त्वा नागनाथस्य मूर्ध्नि शंकरं करं अधात्। सः तदा एव गीष्पतिसमः वक्ता ज्ञाता बभूव।७३। सद्गुरुः विप्रं प्राह, 'इयं ते सुभगा सती भार्या चतुरः चतुरान् पुत्रान् लभेत्। त्वं अपि भाग्यभाक्।७४। इतः म्लेच्छ+लब्धवृत्तिं हित्वा कुटुम्ब+युक् अत्र एव तिष्ठ। मे सुप्रसादतः तव श्रेयः भवेत्।७५। स्वकैः स्नात्वा अद्य भाद्रशुद्धचतुर्दशे तिथौ तारकं अनन्तव्रतं अस्ति, तत् त्वं आचर।'७६।

अशा रीतीने श्रीगुरूंची स्तुती करून हर्षोत्फुल्ल चित्ताने सायंदेवाने श्रीगुरूंच्या अवतारांतील लीला कर्नाटक भाषेत क्रमशः गायल्या.७१. सायंदेव वेदज्ञ ब्राह्मण असूनही वेदांतील सूक्ते किंवा पुराणातील स्तोत्रे यांनी स्तुती न करता त्याने कानडी भाषेचा का उपयोग केला? आणि देवालाही ते कसे आवडले असे कुणी म्हणेल. **पूजादि विधीत वैदिक मंत्रांची अपेक्षा आहे. ईश्वरस्तवन मात्र आपापल्या अधिकारानुसार करावे.** त्याला कांही प्रत्यवाय नाही. उलट ईश्वराची प्रसन्नताच लाभते. कारण ईश्वराला प्रेमाची आवड असते. तो भक्तीनेच प्रसन्न होतो.

श्रीगुरू भगवान् प्रसन्न झाले आणि सायंदेवाला इष्ट वर देऊन म्हणाले, 'हा तुझा वडील मुलगा धन्य आहे. तो सर्वमान्य होईल. हा मला अतिशय प्रिय आहे.'७२. असे म्हणून त्यांनी त्या नागनाथाच्या मस्तकावर हात ठेवला. तो तत्क्षणीच बृहस्पतीसमान वक्ता आणि ज्ञाता झाला.७३.

**धर्मः कृष्णोपदेशेन चरित्वा यद्व्रतं महत् । दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वागात्सतनुर्दिवम् ।।७७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भवान्देवोऽस्ति नोऽनन्तो भवत्सेवाव्रतं परम् । तथापि श्रोतुमिच्छामि को धर्मः कीदृशं व्रतम् ।।७८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धर्मोऽभूत्पाण्डवो राजा तत्सदस्यां सुयोधनः । मायाभ्रान्त्यापतन्मानी व्रीडितो जनहास्यतः ।।७९।।**

'धर्मः यत् महत् व्रतं कृष्ण+उपदेशेन चरित्वा दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वा सतनुः दिवं अगात्।'७७। सायंदेव उवाच। 'भवान् नः देवः अस्ति। भवत्+सेवा परं व्रतं (चि अस्ति)। तथापि (अहं) कः धर्मः, कीदृशं व्रतं, श्रोतुं इच्छामि।'७८। श्रीगुरुः उवाच। 'धर्मः पाण्डवः राजा अभूत्। तत् सदस्यां मानी सुयोधनः माया+भ्रान्त्या अपतत्। जन+हास्यतः व्रीडितः।७९।

सद्गुरू सायंदेवाला म्हणाले, 'ही तुझी भाग्यवती आणि पतिव्रता स्त्री चार बुद्धिमान् पुत्रांची आई होईल. तूसुद्धा भाग्यशाली आहेस.७४. यापुढे उपजीवेकेसाठी यवनांची सेवा करू नकोस. तू तुझ्या कुटुंबासह इथे गाणगापुरातच राहा. माझ्या प्रसादाने तुझे कल्याण होईल. ७५.आज भाद्रपद शुद्ध चतुर्दशी आहे. तरी तू आपल्या परिवारासह स्नानादि करून तारक अशा अनंतव्रताचे आचरण कर.'७६. धर्मराजाने श्रीकृष्णाच्या उपदेशाने हे महान् व्रत केले. त्याच्या प्रभावाने दिव्य सौख्याचा आणि सार्वभौम राज्याचा उपभोग घेऊन सदेह स्वर्गाला गेला.७७. सायंदेवांनी विचारले, 'आमचे तर आपणच देव आहात आणि आपली सेवा हेच आमचे परम व्रत आहे. तरीही मला हे जाणण्याची इच्छा आहे की हा धर्मराजा कोण? आणि हे व्रत कसे करतात?'७८. श्रीगुरू उत्तरले, 'धर्म पण्डूचा पुत्र राजा होता. एकदा त्याच्या मयासुराने निर्मिलेल्या सभेत दुर्योधन मायेच्या भुलीने पाण्याला भूमी, भूमीला पाणी, दाराला भिंत आणि भिंतीला दार समजून पडला. तेव्हा झालेला उपहास मानी सुयोधनाच्या जिव्हारी लागला.७९.

**जित्वा द्यूतमिषाद्धर्मं हृततच्छ्रीः स सानुजम् । वनाय प्रेरयत्सोऽपि तत्र गत्वा सुदुःखितः ॥८०॥**
**स एकदागतं कृष्णं नत्वा सस्त्र्यनुजोऽब्रवीत् । त्वन्नस्त्रातेति बिरुदं वहन्नोऽकं न वेत्सि किम् ॥८१॥**

**॥ श्रीकृष्ण उवाच ॥**

**बलवद्दैवमपि मां भजतां नेक्षते सदा । त्वं मद्भक्तोऽपि मद्वाक्यात् कुर्वनन्तव्रतं महत् ॥८२॥**
**कोऽनन्तस्तद्व्रतं कीदृक् पुरा केन कृतं वद । इति धर्मानुयोगं स श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे ॥८३॥**

सः द्यूत+मिषात् धर्मं स+अनुजं जित्वा हृत+तत्+श्रीः वनाय प्रेरयत्। सः अपि तत्र सुदुःखितः।८०। सः एकदा आगतं कृष्णं स+स्त्री+अनुजः नत्वा अब्रवीत्। त्वं नः त्राता इति बिरुदं वहन् नः अकं न वेत्सि किम्?'८१। श्रीकृष्ण उवाच। 'सदा मां भजतां बलवत् दैवं अपि न ईक्षते। (तथा) अपि त्वं मत् भक्तः। मत् वाक्यात् महत् अनन्तव्रतं कुरु।'८२। 'कः अनन्तः? कीदृक् व्रतं?' इति धर्म+अनुयोगं श्रुत्वा सः वक्तुं प्रचक्रमे।८३।

त्याने धर्मराजाला कपटद्यूताने हरवले आणि त्याचे राज्य आणि संपत्ती हिरावून घेऊन त्याला बंधूंसहित बारा वर्षांच्या वनवासाला पाठविले.८०. तेव्हा तिथे वनवासाचे कष्ट भोगणाऱ्या पांडवांना भेटायला श्रीकृष्ण आले असता धर्मराजाने त्याला आपल्या बांधवांसहित नमस्कार केला आणि त्याला विचारले, 'अरे कृष्णा पांडवांचा कैवारी अशी बिरुदावली मिरवतोस; पण तुला आमचे दुःख दिसत नाही का?'८१. श्रीकृष्ण म्हणाले, 'जो निरंतर निर्विकल्प स्थितीत माझ्या भजनात निमग्न असतो त्याच्याकडे दैव कितीही बलवत्तर असले तरी पाहातसुद्धा नाही. कारण दैवाची प्रतिकूलता जाणवण्यासाठी देहतादात्म्य असावे लागते. 'ज्यांचे वासनाजाल निःशेष लय पावले आहे आणि ज्यांच्या पापपुण्यांचा सांठा मुळासह उखडलेला आहे' (पंचदशी १:६१) त्यांच्याकडे दैवाचा दृष्टिक्षेपही होत नाही. अरे, युधिष्ठिरा, तुझी सध्या ती अवस्था नसली तरी तू माझा भक्तच आहेस. तरी तू माझ्या सांगण्यानुसार महान अशा अनंतव्रताचे अनुष्ठान कर.८२. धर्मराजाने विचारले, 'कोण हा अनंत? आणि त्याचे व्रत कसे करावयाचे?' तेव्हा श्रीकृष्णांनी उत्तर दिले.८३.

**चराचरजगत्काल-भूताद्यात्माप्यहं विभुः । कर्मप्रयोजनगुणैर्भूपानन्तोऽस्म्यहं पृथक् ।।८४।।**
**भाद्रशुक्लचतुर्दश्यामनन्तव्रतमुत्तमम् । व्रतिनोऽनन्तफलदं तत्कुर्विष्टमवाप्स्यसि ।।८५।।**
**ऋषिः सुमन्तुः प्रागासीद् वासिष्ठो गौतमीपतिः । तत्स्त्रीः कन्यां प्रसूयैकां मृतान्योद्वाहितामुना ।।८६।।**
**सा दुःशीला कलिद्वेष-प्रिया चण्डी पतिं सुताम् । क्रूरा तौ त्रासयामास कन्यापि ववृधे शुभा ।।८७।।**

'(हे) भूप, अहं विभुः कर्म+प्रयोजन+गुणैः चर+अचर+जगत्+काल+भूत+आदि+आत्मा अपि अहं पृथक् अनन्तः अस्मि।८४। उत्तमं अनन्तव्रतं भाद्र+शुक्ल+चतुर्दश्यां व्रतितं अनन्त+फलदम्। तत् कुरु, इष्टं अवाप्स्यसि।८५। प्राक् सुमन्तुः वासिष्ठः ऋषिः गौतमी+पतिः आसीत्। तत् स्त्रीः एकां कन्यां प्रसूय मृता। अमुना अन्या उद्वाहिता।८६। सा दुःशीला कलि+द्वेष+प्रिया चण्डी क्रूरा तौ पतिं सुतां त्रासयामास। शुभा कन्या अपि ववृधे।८७।

'माझ्या व्यापकत्वाने हे सर्व चराचर जगत्, काल, सर्व जीव इत्यादि मीच झालो आहे. कर्म, प्रयोजन, गुण वगैरेंनी मीच हे सर्व करूनसुद्धा मी वेगळाच आहे. पुरुषसूक्तांत (ऋग्वेद संहिता १०:९०:३) म्हणाल्याप्रमाणे ह्या सर्वांपेक्षाही अधिक श्रेष्ठ मी आहे. (*अतो ज्यायाँश्च पुरुषः... पादोऽस्य विश्वा भूतानि*) गीतेतही (१०:४१) माझे प्रतिपादन आह की मी माझ्या एका अंशाने हे सर्व विश्व धारण करून राहिलो आहे (*विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्।*), म्हणूनच काल, देश इत्यादि परिच्छेदरहित अनंत तो मीच आहे.'८४. 'हे उत्तम असे अनंतव्रत भाद्रपद शुक्ल चतुर्दशीला केले असता अनंत फल प्राप्त होते. ते तू कर म्हणजे तुला तुझे इष्ट प्राप्त होईल.'८५. पूर्वी सुमन्तु नावाचे एक वासिष्ठ गोत्रीय ऋषी होते. त्यांच्या पत्नीचे नाव गौतमी असे होते. तिने एका मुलीला जन्म दिला आणि ती कालवश झाली. गृहस्थाश्रमाच्या निर्वाहासाठी त्या ऋषींनी दुसरा विवाह केला.८६. ती दुष्ट, संतापी, भांडकुदळ, आकस धरणारी आणि क्रूर स्वभावाची होती. ती पतीचा आणि कन्येचाही छळ करू लागली. ती सुस्वभावी कन्या मात्र वाढू लागली.८७.

**चित्रक्रियापटुं सोऽदात् सच्छीलगुणलक्षणाम् । कौण्डिण्याय स्वगृह्योक्त-ब्राह्मोद्वाहविधानतः ।।८८।।**
**तत्र श्वशुरवात्सल्यात् स्थित्वा मासद्वयं मुनिः । श्वश्रूत्रस्तो ययौ वध्वा कौण्डिण्यः श्वशुराज्ञया ।।८९।।**
**चण्ड्यारर्रं दृढं बध्वा पाथेयं नार्पितं स तु । प्रादाद्बहिस्थगोधूम-पुलाकं तौ ततो गतौ ।।९०।।**
**मध्याह्ने तस्थतुर्नद्यां चिरण्टीः प्रेक्ष्य तत्र सा । गत्वार्चयन्तीः प्राहेदं युष्माभिः क्रियते किमु ।।९१।।**

सः चित्र+क्रिया+पटुं सत्+शील+गुण+लक्षणां (कन्यां) कौण्डिण्याय स्व+गृह्य+उक्त+विधानतः अदात्।८८। श्वशुर+वात्सल्यात् मुनिः तत्र मास+द्वयं स्थित्वा कोण्डिण्यः श्वश्रू+त्रस्तः वध्वा श्वशुर+आज्ञया ययौ।८९। चण्ड्या अररं दृढं बध्वा पाथेयं न अर्पितम्। सः तु बहिस्थ गोधूम+पुलाकं अदात्। ततः तौ गतौ।९०। मध्य+अह्ने नद्यां तस्थतुः। तत्र सा अर्चयन्तीः चिरण्टीः प्रेक्ष्य गत्वा प्राह, 'इदं युष्माभिः किं उ क्रियते?'९१।

त्या चित्रकलाकुशल, सुशील, गुणी आणि सुलक्षणी मुलीला सुमंतूंनी आपल्या गृह्यसूत्रानुसार ब्राह्म विवाहाने कौंडिण्य ऋषींना दिली.८८. विवाहानंतर सासऱ्यांच्या आग्रहाने मुलगी आणि जावई तिथे राहिले. पण नंतर सासूच्या छळाला कंटाळून कोंडिण्य मुनी सासऱ्यांची अनुज्ञा घेऊन तिथून सपत्नीक निघाले.८९. त्या वेळी सुमंतूच्या त्या क्रोधी पत्नीने घरातील कपाटांना कुलूपे लावून लेक-जावयांना काहीच शिदोरी दिली नाही. सुमंतू ऋषींनी बाहेर पडलेला गव्हाचा कोंडा तेवढा बांधून देऊन लेक आणि जांवई रवाना झाले.९०. दुपारच्या वेळी ते एका नदीकाठी थांबले असता त्या कन्येने तिथे कांही सुवासिनी मिळून पूजा करताना पाहिल्या. तेव्हा तिने त्यांच्याजवळ जाऊन विचारले, 'तुम्ही सर्वजणी हे काय करीत आहांत?'९१ 'हे अनंतव्रत अनंत फल देते' हा अर्थवाद आहे. चातुर्मास्याच्या फलाप्रमाणे केवळ प्रशंसा करणे हाच त्याचा उद्देश्य आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. अर्थवाद तीन प्रकारचे आहेत. वास्तव्याशी विरोध असेल तर तो गुणवाद होतो, दुसऱ्या प्रमाणांशी सुसंगत असेल तर अनुवाद होतो आणि वस्तुनिष्ठ असेल तर भूतार्थवाद होतो (*विरोधे गुणवादः स्यादनुवादोऽवधारिते। भूतार्थवादस्तद्धानादर्थवादस्त्रिधा मतः।।*). 'यूप (यज्ञस्तंभ) हा आदित्य आहे' या विधानांत सूर्याची तेजस्विता गुण यूपांत आहे असा भावार्थ आहे.

**।। स्त्रिय ऊचुः ।।**

**भाद्रशुद्धचतुर्दश्यामद्यानन्तव्रतं शृणु । स्नात्वा रक्ताम्बरं धृत्वा रक्तसूत्रे चतुर्दश ।।९२।।**
**ग्रन्थीन्बध्वा सप्तफण-दर्भशेषे निधाय तम् । कुम्भोपरि चतुर्बाहुं ध्यात्वानन्तं प्रपूज्य च ।।९३।।**

स्त्रियः ऊचुः। अद्य भाद्र+शुद्ध+चतुर्दश्यां अनन्तव्रतम्। शृणु। स्नात्वा रक्त+अम्बरं धृत्वा, रक्त+सूत्रे चतुर्दश ग्रन्थीन् बध्वा सप्त+फण+दर्भ+शेषे निधाय कुम्भ+उपरि चतुः+बाहुं अनन्तं ध्यात्वा, प्रपूज्य च,।९२-९२।

वस्तुतः यूप वेगळा आणि सूर्य वेगळा. हे गुणवादाचे उदाहरण आहे. 'अग्नी हे थंडीचे औषध आहे' ह्या विधानाची इतर प्रमाणांनी पुष्टी होते म्हणून तो अनुवाद ठरतो. भूतार्थवादांत विधानाची आणि इतर प्रमाणांची अर्थशः एकवाक्यता असते. चराचर जगताशी एकरूप असूनही त्याहून अधिक आणि वेगळे स्वरूप असणारा अनंत इथे उपास्य म्हणून प्रतिपादलेला आहे. त्यामुळे त्याची प्राप्ती ह्या फळाचे आनंत्य त्याच्याशी सुसंगत आहे. म्हणून हा भूतार्थवाद होतो. अनंत फळ याचा अर्थ एकाच वेळी सर्व कामांची पूर्णता. ही फक्त आत्मानुभवातच होते. तैत्तिरीय उपनिषदाचे (२:१:१) वचन आहे की, 'गहन अंतरांतल्या सत्य, ज्ञान, अनंत अशा ब्रह्माला जाणणाऱ्याच्या सर्व कामांची पूर्ती होते.' अज्ञानी पुरुष एकामागून एक कर्मफलांनी मिळालेली शरीरे धारण करून डोळे, कान इत्यादि उपाधींच्या माध्यमांतून, पाण्यातल्या सूर्यासारख्या जीवरूपाने त्या त्या भोगांचा अनुभव घेतो. ज्ञानी मात्र सर्व सुखभोग एकाच वेळी अनुभवतो. असे फळ अनंतव्रताने लाभत असल्याने ते अनंत व्रत आहे. चातुर्मास्याप्रमाणे केवळ प्रशंसात्मक अक्षय्य फळ नाही.

त्या स्त्रिया तिला म्हणाल्या, 'आज भाद्रपद शुक्ल चतुर्दशी असून हा अनंतव्रताचा नियत दिवस आहे. ते कसे करायचे ते ऐक. स्नान करून लाल वस्त्र परिधान करावे. मग लाल दोरकाला चौदा गाठी बांधून, तो पाण्याने भरलेल्या कलशावर ठेवलेल्या सात फणांच्या दर्भाच्या शेषावर स्थापन करावा. त्याच्यावर चतर्भुज अनंताचे ध्यान करून त्याची पूजा करावी.९२-९३.

**दत्वा चतुर्दशापूपान् ब्रह्मणे जीर्णदोरकम् । विसृज्य दत्वा नूत्नं स्वे बध्वा हस्ते च दम्पती ॥९४॥**
**संतर्प्याब्दे घटान्दद्याच् चतुर्दश चतुर्दशे । प्रत्यब्दं पूजयेद् भक्त्या वरं नातः परं व्रतम् ॥९५॥**
**कुर्वदोऽभीष्टदमपि प्रोक्त्वास्यै दोरकं ददुः । सापि तत्र व्रतं कृत्वा पतिं प्राप सदोरका ॥९६॥**
**ततो यान्तौ धनी कश्चिद् ग्रामं नीत्वा श्रियं ददौ । तत्रानन्तप्रसादात्तौ श्रीमानाढ्यौ बभूवतुः ॥९७॥**
**दोरं दृष्ट्वैकदाग्नौ स जहौ मत्वा वशीकृतिम् । श्रीदानन्तं न त्यजेति वारितोऽपि तया ऋषिः ॥९८॥**

ब्रह्मणे चतुर्दश अपूपान् दत्वा, जीर्ण+दोरकं विसृज्य दत्वा, नूत्नं स्वे हस्ते बध्वा च, दम्पती संतर्प्य,।९४। चतुर्दशे अब्दे चतुर्दश घटान् दद्यात्। प्रति+अब्दं भक्त्या पूजयेत्। अतः परं व्रतं न।९५। अभीष्ट+दं अपि इदं कुरु। इति प्रोक्त्वा अस्यै दोरकं ददुः। सा अपि तत्र व्रतं कृत्वा सदोरका पतिं प्राप।९६। ततः यान्तौ कश्चित् धनी ग्रामं नीत्वा श्रियं ददौ। तत्र तौ अनन्त+प्रसादात् श्रीमान् आढ्यौ बभूवतुः।९७। एकदां दोरं दृष्ट्वा वशी+कृतिं मत्वा सः ऋषिः, तया 'श्री+द+अनन्तं न त्यज'इति वारितः अपि, अग्नौ जहौ।९८।

त्याला चौदा अपूपांचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणाला द्यावेत. जुन्या (आधीच्या वर्षाच्या) दोरकाचे विसर्जन करून तो ब्राह्मणाला दान करावा आणि नवा पूजा केलेला दोरक हातात बांधावा. अनंताप्रीत्यर्थ एका दंपतीला भोजन घालावे.९४. असे चौदा वर्षे व्रत केल्यावर चौदा घटांचे दान करून उद्यापन करावे. यापेक्षा श्रेष्ठ व्रत नाही.९५. हे आपले अभीष्ट प्राप्त करून देणारे व्रत आहे. तूसुद्धा हे व्रत कर.' असे म्हणून त्यांनी तिलाही एक दोरक दिला. तिनेही ते व्रत केले आणि दोरक हातात बांधून पतीकडे आली. इतर व्रतात स्त्रियांना स्वातंत्र्य नसले तरी परमार्थांत मात्र त्यांना स्वातंत्र्य आहे असे इथे दिसते. अन्यथा देवाचा प्रसाद कसा होईल?९६. तिथून पुढे जात असता कुणी एका धनवान् गृहस्थाने त्यांना आपल्या गावात नेऊन खूपशी संपत्ती दिली. तिथे अनन्ताच्या कृपाप्रसादाने ते संपन्न आणि प्रतिष्ठित झाले.९७. एकदा कौंडिण्य ऋषींनी पत्नीच्या हातातला तो दोरा पाहिला आणि हा कांही वशीकरणाचा प्रकार आहे अशा समजुतीने, पत्नी 'अहो वैभव देणारा अनंत टाकू नका' अशी विनवणी करूनही त्या मुनीनी आगीत टाकून दिला.९८.

**तदाहृताग्न्यरिभ्यः श्रीस् ततोऽनन्तं स्मरन्नटन् । वनेऽनन्तः क्वेति स गो-द्रुगाः पृष्ट्वाप कश्मलम् ।।९९।।**
**तस्मै नीत्वा वृद्धविप्र-रूपेण पुरमद्भुतम् । स्वं रूपं दर्शयामास तुष्टावानन्तमप्यसौ ।।१००।।**
**जय सर्वेश्वरानन्त विश्वव्यापिन्जनार्दन । त्वन्मायामोहितधिया कृतान्मन्तून्क्षमस्व मे ।।१०१।।**

**।। श्रीमदनन्त उवाच ।।**

**न दैन्यं दुष्कृतं तेऽत्र श्रियं भुक्त्वा पुनर्वसुः । नक्षत्रेषु प्रसादान्मे भविष्यसि महामुने ।।१०२।।**

तदा अग्नि+अरिभ्यः श्रीः हृतः। ततः सः अनन्तं स्मरन् वने अटन् 'अनन्तः क्व?' इति गो+द्रु+गाः पृष्ट्वा कश्मलं आप।९९। तस्मै वृद्ध+विप्र+रूपेण अद्भुतं पुरं नीत्वा स्वं रूपं दर्शयामास। असौ अपि अनन्तं तुष्टाव।१००। '(हे) ईश, भगवन् त्वं वाच्य+वाचक+तया जगत्+मयः ॐकार+वाच्य त्रिगुण+आत्मकः असि। (हे) सर्व+ईश्वर, विश्व+व्यापिन्, जनार्दन, त्वत्+माया+मोहित+धिया कृतान् मे मन्तून् क्षमस्व।'१०१। श्रीमत् अनन्त उवाच। 'ते दैन्यं दुष्कृतं न। (हे) महामुने, अत्र श्रियं भुक्त्वा मे प्रसादात् नक्षत्रेषु पुनर्वसुः भविष्यसि।'१०२।

तेव्हा अनंताच्या कोपाने त्यांची सर्व संपत्ती अग्नी आणि शत्रू यांनी हिरावून घेतली. तेव्हा 'हा अनंताचाच कोप आहे,' असे जाणून तो कौंडिण्य अनंताचे स्मरण करीत, 'अनंत मला कुठे भेटेल?' असे बैल, वृक्ष, गाय यांना विचारीत वनात भटकता भटकता मूर्च्छित झाला.९९. तेव्हा अनंतदेवाला दया येऊन त्यांनी त्याला सावध करून त्याला धीर देऊन एका अद्भुत नगरीत नेले आणि आपले स्वरूप दाखविले. ऋषींनी त्यांचे स्तवन केले.१००. भगवंता, ईश्वरा, वाच्य आणि वाचक तूच असल्याने तू जगताला व्यापून उरला आहेस. तूंच ॐकाराचा अर्थ आहेस आणि त्रिगुणात्मक आहेस. जनार्दना, तुझ्याच मायेने भुलून मी केलेल्या अपराधांची क्षमा कर.१०१. श्रीमत् अनन्तांनी त्याला वर दिला, 'तुला दैन्य आणि पाप लागणार नाहीत. इहजन्मी वैभव भोगून तू माझ्या प्रसादाने नक्षत्रमंडलांत पुनर्वसु होशील.'१०२.

॥ ऋषिरुवाच ॥

**केऽपि सत्फलिताम्रस्य फलं नाश्नन्ति गोर्मुखे । तृणं नैति पशोश्चापि स्वाद्वप्पूर्णे सरोवरे ॥१०३॥**
**जीवास्पृष्टेऽग्रतो दीनौ खरेभौ च द्विजो जरन् । एते दृष्टा मयैतेषां कुतोऽभूदीदृशी स्थितिः ॥१०४॥**

॥ श्रीमदनन्त उवाच ॥

**शिष्यान्नापाठयन्मत्तो विद्वांस्तेनाम्र ईदृशः । गौर्जाता मोघभूदानाद् वृषोऽदाताभवद्धनी ॥१०५॥**
**अन्योन्यदानग्रहणादीदृश्यौ स्तः सरस्युभे । खरः क्रोधीभो मदी च द्विजोऽहं तेऽपि मोचिताः ॥१०६॥**

ऋषिः उवाच। 'सत्+फलित+आम्रस्य फलं के अपि न अश्नन्ति। गोः मुखे तृणं न एति पशोःअपि। स्वादु+अप्+पूर्णे सरोवरे जीव+अस्पृष्टे।१०३। अग्रे दीनौ खर+इभौ, जरत् द्विजः च। एते मया दृष्टाः। एषां ईदृशी स्थितिः कुतः अभूत्?'१०४। श्रीमत् अनन्त उवाच। 'मत्तः विद्वान् शिष्यान् न अपठयन् तेन ईदृशः आम्रः। मोघ+भू+दानात् गौः जाता। अदाता धनी वृषः अभवत्।'१०५। उभे अन्यः+अन्य+दान+ग्रहणात् सरसि स्तः। क्रोधी खरः, मदी च इभः। अहं द्विजः। ते अपि मोचिताः।'१०६।

ऋषींनी अनन्ताला विचारले, 'मी येताना एक आंबा पाहिला. तो उत्तम फळांनी लखडलेला असूनही त्याची फळे कुणीच खात नाहीत. तसेच पुढे एक गाय पाहिली. तिच्या व पशूंच्या तोंडात गवतच येत नाही. पुढे गोड पाण्याने भरलेल्या दोन तळ्या पाहिल्या. त्यांना कुठलेही जीव स्पर्शत नव्हते.१०३. पुढे दीनवाणे दिसणारे एक गाढव व एक हत्ती पाहिले. आणि एक वृद्ध ब्राह्मण पाहिला. त्यांची ही अशी अवस्था का झाली?'१०४. श्रीमत् अनन्तदेव म्हणाले, 'आपल्या विद्वत्तेच्या मदात शिष्यांना न शिकवल्याने तो विद्वान् असा आम्रवृक्ष झाला. नापीक जमिनीचे दान करणारी या गाईच्या जन्माला आली. धनवान् असूनही दान न केल्याने बैल झाला.१०५. दोघींनी आपापसांतच दान दिले-घेतले म्हणून त्या ह्या तळ्या झाल्या. क्रोधी माणसाला गाढवाचा, मदोन्मत्ताला हत्तीचा जन्म मिळाला. तो वृद्ध मीच होतो. या सर्व तू पाहिलेल्या जीवांना मुक्ती दिली.'१०६.

**इति लब्धवरोऽनन्तं नत्वैत्य स तथाभवत् । तस्माद्व्रतोत्तमं धर्म व्रतं चर हितं भवेत् ।।१०७।।**
**इति कृष्णोऽब्रवीत्सोऽपि व्रतं कृत्वा हताहितः । अकण्टकं चिरं राज्यमृद्धं भुक्त्वामृतं ययौ ।।१०८।।**
**त्वमप्याचर विप्रेदमत्रामुत्रापि सौख्यदम् । इत्युक्तः प्रभुणानन्त-व्रतं चक्रे द्विजोत्तमः ।।१०९।।**
**तत्र स्थित्वा स्वकैः सार्धं प्रेत्य सायुज्यमाप्तवान् । तद्वंशजा अपि गुरोः प्रसादात्तादृशोऽभवन् ।।११०।।**

'इति लब्ध+वरः सः अनन्तं नत्वा एत्य तथा अभवत्। तस्मात् (हे) धर्म, व्रतं चर हितं भवेत्।'१०७। इति कृष्णः अब्रवीत्। सः अपि व्रतं कृत्वा हत+अहितः अकण्टकं चिरं ऋद्धं राज्यं भुक्त्वा अमृतं ययौ।१०८। '(हे) विप्र त्वं अपि अत्र अमुत्र अपि सौख्यदं (व्रतं) आचर।' इति प्रभुणा उक्तः द्विजउत्तमः अनन्तव्रतं चक्रे।१०९। स्वकैः सार्धं तत्र स्थित्वा प्रेत्य सायुज्यं आप्तवान्। तत् वंशजाः अपि गुरौः प्रसादात् तादृशाः अभवन्।११०।

'असा वर पावून त्या कौंडिण्याने अनन्ताला नमस्कार केला. घरी परत येऊन त्याप्रमाणेच सिद्धी मिळाली. यासाठी, हे धर्मराजा, तू हे महान् व्रत कर. तुझे कल्याण होईल!'१०७. असा श्रीकृष्णाचा आदेश झाल्याप्रमाणे त्याने अनंतव्रत केले. त्यायोगे त्याने शत्रूचा नाश करून अकंटक आणि समृद्ध राज्य दीर्घकाल उपभोगले आणि अंती मोक्ष पावला.१०८. श्रीगुरू सायंदेवाला सांगतात, 'ब्राह्मणा, तूसुद्धा ह्या इह आणि परत्र सुख देणाऱ्या व्रताचे आचरण कर.' अशी श्रीगुरूंची आज्ञा घेऊन त्या ब्राह्मणवर्याने अनंतव्रत केले.१०९. आपल्या कुटंबासह तिथे गाणगापुरांत राहून मृत्यूनंतर सायुज्य मुक्तीचा धनी झाला. त्याचे वंशजही श्रीगुरूंच्या प्रसादाने त्याच्यासारखेच झाले.११०.

**त्वमपीदृक्तत्प्रसादाद् भक्तिमानसि सद्गुरौ । मा भीस्तरिष्यसि भवं मृगतृष्णोपमं द्रुतम् ।।१११।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।**

**आदितः विंशोऽध्यायः ।।**

त्वं अपि तत्+प्रसादात् ईदृक् सत्+गुरौ भक्तिमान् असि। मा भीः। मृग+तृष्ण+उपमं भवं द्रुतं तरिष्यसि।१११।

नामधारका, तूही त्यांच्याप्रमाणेच सद्गुरूंच्या भक्तीने संपन्न आहेस! भिऊ नकोस! हा मृगजळासारखा संसारसागर तू सहज तरून जाशील.'

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा दुसरा आणि प्रथमपासून विसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधूदितं चरित्रं भो प्रभोर्धन्यं दिनं त्विदम् । क्षणमात्रोऽपि कालोऽद्य नातीतस्तत्कथामृते ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**तन्तुको नाम भक्तोऽभूत् त्रियामं भगवत्प्रियः । संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तमाभजत् ।।२।।**
**तद्बन्धुता कदाचित्तं श्रीशैलं गन्तुमाह्वयत् । स प्राह मे मठः शैलः श्रीगुरुर्मल्लिकार्जुनः ।।३।।**

नामधारक उवाच। भोः प्रभोः चरित्रं साधु उदितम्। इदं दिनं तु धन्यम्। अद्य क्षणमात्रः अपि कालः तत् कथां ऋते न अतीतः।१। सिद्ध उवाच। तन्तुकः नाम भगवत्+प्रियः भक्तः अभूत्। त्रियामं संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तं आभजत्।२। कदाचित् तत् बन्धुता तं श्रीशैलं गन्तुं आह्वयत्। स प्राह, 'मठः मे शैलः, श्रीगुरुः मल्लिक+अर्जुनः'। 'कुतः न इतः असि' इति अजेन पृष्टः अपि पूर्ववत् प्राह।३।

नामधारक म्हणाला, 'आपण श्रीगुरुप्रभूंचे चरित्र फार उत्तम सांगितले. आजचा दिवस खरोखर धन्य आहे! क्षणभरसुद्धा आज श्रीगुरूंच्या कथेवाचून गेला नाही.'१. सिद्धमुनींनी सांगायला सुरुवात केली. 'तन्तुक नावाचा श्रीगुरूंना प्रिय असलेला एक शिष्य होता. तो दिवसाचे तीन प्रहर आपले सांसारिक कर्तव्य पार पाडून एक प्रहर (तीन तास) श्रीगुरूंची सेवा करीत असे.'२. एकदा त्याची भावकी श्रीशैल्याच्या यात्रेला निघाली. तेव्हा त्यालाही आपल्याबरोबर येण्याचा त्यांनी आग्रह केला. तो म्हणाला, 'गाणगापूरचा हा मठ हेच माझे श्रीशैल्य आहे; आणि श्रीगुरू हेच माझे मल्लिकार्जुन आहेत.'३.

**सा तं निषिध्य मूर्खोऽयमिति मत्वा ययौ नगम् । कुतो नेतोऽसीत्यजेन पृष्टोऽपि प्राह पूर्ववत् ।।४।।**
**ततो माघेऽल्पकालेन शिवरात्रिरुपस्थिता । मध्याह्ने तद्दिनेऽजस्तं प्राह शैलोत्सवोऽद्य सन् ।।५।।**

**।। तन्तुक उवाच ।।**

**त्वत्पादाब्जोत्सवान्मन्ये क्वापि नास्त्यधिकोत्सवः । इदं प्रत्यक्षमज्ञाय मुधा मुग्धा भ्रमन्ति कौ ।।६।।**
**तच्छ्रुत्वा प्राह भगवान्मा ब्रूहीदं जगत्प्रभुः । सर्वत्रावस्थितोऽप्येष सत्क्षेत्रमहिमा वरः ।।७।।**
**महातपस्विभिः क्षेत्रं पवित्रीकृतमस्ति तत् । परमात्मा तत्प्रभावात् तत्र जागर्त्यनारतम् ।।८।।**

सा तं निषिध्य, 'अयं मूर्खः' इति मत्वा नगं ययौ।४। ततः अल्प+कालेन माघे शिवरात्रिः उपस्थिता। तत् दिने मध्य+अह्ने अजः तं प्राह। अद्य शैल+उत्सवः सन्।५। तन्तुक उवाच। त्वत्+पाद+अब्ज+उत्सवात् अधिकः क्व अपि उत्सवः न अस्ति। इदं प्रत्यक्षं अज्ञाय मुग्धा मुधा कौ भ्रमन्ति।६। तत् श्रुत्वा भगवान् प्राह। इदं मा ब्रूहि। जगत्+प्रभुः सर्वत्र अवस्थितः अपि एष सत्+क्षेत्रमहिमा वरः।७। क्षेत्रं महा+तपस्विभिः पवित्री+कृतं अस्ति। तत् तत्+प्रभावात् परमात्मा तत्र अनारतं जागर्ति।८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'आपल्या बांधवांसह श्रीशैल्याला का गेला नाहीस?' तेव्हाही त्याने पूर्वीप्रमाणेच उत्तर दिले.४. पुढे थोड्याच काळाने माघ महिन्यात शिवरात्र आली. त्या दिवशी माध्याह्नी श्रीगुरू म्हणाले, 'आज श्रीशैल्याचा मोठा उत्सव आहे.'

तन्तुक उत्तरला, 'आपल्या चरणकमलांपेक्षा मोठा उत्सव कुठेच नाही. हे प्रत्यक्ष सोडून अज्ञानी लोक उगीच पृथ्वीवर भटकत असतात.'६. त्याचे बोलणे ऐकून श्रीगुरुभगवान म्हणाले, 'असे बोलू नकोस. जगाचा स्वामी सर्वत्रच आहे हे खरे आहे. पण पुण्यक्षेत्रांचा महिमा थोर आहे.७. क्षेत्र महान् तपस्व्यांनी आपल्या वास्तव्याने पवित्र केलेले असते. म्हणून त्यांच्या प्रभावाने तिथे परमेश्वर निरंतर जागत असतो.८.

**अतस्तत्रैव भजतां कार्यसिद्धिर्भवत्यरम् । महातपस्विनो धन्याः स्वयं मुक्ता अपीतरान् ।।९।।**
**मोचयन्ति स्वतपसा जन्मसंसारबन्धनात् । लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः ।।१०।।**
**तत्संचारस्थलरजः-संस्पर्शोऽप्यत्र मुक्तये । अतस्तत्सेवितक्षेत्रे लोको यास्यति सादरम् ।।११।।**
**एह्यद्य योगगत्याद्रिं गत्वा ते दर्शयामि तत् । इत्युक्त्वा पादुके दिव्ये धारयित्वा दृढं दृशौ ।।१२।।**
**निमीलयित्वा श्रीशैलं सह तेन ययौ क्षणात् । प्राहोन्मील्य दृशौ पश्य श्रीशैलममुमित्यजः ।।१३।।**

अतः तत्र एव भजतां अरं कार्य+सिद्धिः भवति। महा+तपस्विनः धन्याः। स्वयं मुक्ताः अपि इतरान्..।९। स्व+तपसा जन्म+संसार+बन्धनात् मोचयन्ति। सत्+तपस्वि+विभूतयः लोक+उद्धृत्यै प्रजायन्ति।१०। 'तत् संचार+स्थल+रज+स्पर्शः अपि अत्र मुक्तये। अतः तत्+सेवित+क्षेत्रे लोकाः सादरं याति'।११। 'एहि, अद्य योग+गत्या अद्रिं गत्वा तत् ते दर्शयामि,' इति उक्त्वा दिव्ये पादुका धारयित्वा, दृशौ दृढं..।१२। निमीलयित्वा तेन सह क्षणात् श्रीशैलं ययौ। 'अमुं श्रीशैलं, दृशौ उन्मील्य पश्य,' इति अजः प्राह।१३।

त्यामुळे तिथे पूजा-पाठ-जप आदि उपासना करणाऱ्यांची कार्यसिद्धी लवकर होते. महातपस्वी हे स्वतः तर मुक्त असतातच पण इतरांनाही..(९) आपल्या तपाच्या सामर्थ्याने मुक्त करतात. लोकांच्या उद्धारासाठीच ह्या थोर तपस्वी विभूती जन्माला येतात.१०. (*जगाच्या कल्याणा संताच्या विभूती।* संत तुकाराम)' 'त्यांच्या संचाराने पावन झालेल्या भूमीची धूळ जरी लागली तर माणूस मुक्त होतो. म्हणून त्यांच्या वासाने पवित्र झालेल्या क्षेत्रांना लोक आदरपूर्वक जातात.(११) चल, आज योगगतीने मी तुला नेऊन श्रीशैल्याचे दर्शन घडवितो.' असे म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपल्या दिव्य पादुका धरून डोळे घट्ट मिटायला सांगितले. क्षणार्धात श्रीशैल्याला येऊन म्हणाले, 'डोळे उघडून पाहा हा श्रीशैल्य पर्वत!'१३.

**सोऽप्युन्मीलितदृग्दृष्ट्वा श्रीगिरिं तदनुज्ञया । क्षौरस्नानादि कृत्वागाद् द्रष्टुं श्रीमल्लिकार्जुनम् ॥१४॥**
**यान्तं स्वकः प्रेक्ष्य तमाह नोऽनु-यातोऽसि कस्मान्न युतिं करोषि ।**
**अद्य क्षणाच्छ्रीगुरुणाऽऽहृतोऽस्मी-त्युक्तोऽपि तेनोक्तममंस्त मिथ्या ॥१५॥**
**तस्मै यथास्वं स निवेद्य भक्तो । गुर्वङ्घ्रिपद्मद्वय एकतानः ।**
**प्रासादमेत्यान्तरनेकलोक-व्याप्तं विवेशेश्वरदर्शनाय ॥१६॥**
**तत्रोपविष्टं गुरुमर्चयन्ति । सर्वेऽपि कश्चिन्न हि तत्र देवः ।**
**इत्थं विलोक्यापि गुरुं प्रपूज्य । पुनर्गुरुं प्राप्य तदुक्तवान्सः ॥१७॥**

सः अपि उन्मीलित+दृक् श्रीगिरिं दृष्ट्वा तत् अनुज्ञया क्षौर+स्नान+आदि कृत्वा श्रीमल्लिकार्जुनं द्रष्टुं अगात्।१४। स्वकः यान्तं प्रेक्ष्य तं आह, 'नः अनुयातः असि! कस्मात् युतिं न करोषि?' तेन उक्तम् 'अद्य क्षणात् गुरुणा आहृतः अस्मि', मिथ्या ममंस्त।१५। सः भक्तः तस्मै यथास्वं निवेद्य गुरु+अङ्घ्रि+पद्म+द्वय एकतानः अनेक+लोक+व्याप्तं प्रासादं एत्य ईश्वर+दर्शनाय अन्तः विवेश।१६। तत्र सर्वे अपि उपविष्टं गुरुं अर्चयन्ति। तत्र कश्चित् देवः न हि। इत्थं विलोक्य अपि गुरुं प्रपूज्य पुनः गुरुं प्राप्य सः तत् उक्तवान्।१७।

तंतुकाने डोळे उघडून श्रीगिरीचे दर्शन घेतले. मग त्याने श्रीगुरूंच्या आज्ञेने क्षौर, स्नान इत्यादि करून तो श्रीमल्लिकार्जुनाच्या दर्शनासाठी निघाला.१४. त्याला देवळात जाताना त्याच्या आप्ताने पाहिले. तो म्हणाला, 'आमच्या मागे मागे आलास तर मग वाटेत आम्हाला का भेटला नाहीस?' त्याने आपल्याला श्रीगुरूंनी आत्ता एका क्षणापूर्वी आणल्याचे सांगितले. त्याचा त्याच्यावर विश्वास न बसल्याने तो खोटे सांगतो असेच त्याला वाटले.१५. त्या आप्ताचे यथायोग्य समाधान करून तो श्रीगुरुचरणांच्या पायांच्या चिंतनात एकाग्रचित्त होऊन, दर्शनोत्सुक लोकांनी गजबजलेल्या त्या मंदिरांत आला आणि ईश्वरदर्शनासाठी त्याने अंतर्गृहात प्रवेश केला.१६. त्याने पाहिले तर तिथे कोणताच देव नसून श्रीगुरूच बसलेले आहेत. सर्व लोक त्यांचीच पूजा करीत आहेत. त्यानेही श्रीगुरूंची पूजा केली आणि पुन्हा श्रीगुरूंपाशी येऊन म्हणाला.१७.

**अत्र त्वमेवासि कुतोऽज्ञलोका । आयान्ति हित्वा निकटस्थितं त्वाम् ।**
**व्याप्याखिलं त्वं परिपूर्णविश्वं । दशाङ्गुलं तिष्ठसि वक्ति वेदः ।।१८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**एकः परात्मा भजतां तथापि । स्थानप्रभावः प्रिय भिन्न एव ।**
**स्थानं त्विदं सर्वजनाश्रयं सन् । मुक्तिप्रदं शृण्विह पूर्ववृत्तम् ।।१९।।**
**विमर्षणो नाम नृपः किरात-देशे कृती क्षात्रवृषप्रवीणः ।**
**द्विजातिभक्तोऽपि च भूतमात्र-हिते रतः साधुजनानुयायी ।।२०।।**

'त्वं एव अत्र असि! अज्ञ लोकाः निकट+स्थितं त्वां हित्वा कुतः आयान्ति? (हे) परिपूर्ण, वेदः वक्ति, त्वं अखिलं विश्वं व्याप्य दश+अङ्गुलं तिष्ठसि।'१८। श्रीगुरुः उवाच। (हे) प्रिय, पर+आत्मा एकः। तथापि भजतां स्थान+प्रभावः भिन्न एव। इदं तु सर्व+जन+आश्रयं मुक्ति+प्रदं सन् स्थानम्। इह पूर्ववृत्तं शृणु।१९। किरात+देशे विमर्षणः नाम क्षात्र+वृष+प्रवीणः कृती नृपः द्विजाति+भक्तः अपि च भूत+मात्र+हिते रतः साधु+जन+अनुयायी।२०।

'इथे मंदिरातही आपणच आहात! हे वेडे लोक निकटच असलेल्या तुम्हाला सोडून इतक्या दूर का बरे येतात? परिपूर्ण सद्गुरो, वेदांत सांगितल्याप्रमाणे आपण सर्व विश्व व्यापून दहा अंगुळे उरलेला आहात.' अधिष्ठानत्वाने विवर्ताहून अधिक आहात असा भावार्थ.१८. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'प्रिय भक्ता, परमात्मा एकच आहे. तरीही उपासकांसाठी त्या त्या स्थानांचा प्रभावही वेगवेगळा असतो. हे श्रीशैल्य सर्व लोकांना आश्रयभूत आणि मुक्तिप्रद स्थान आहे. तुला एक प्राचीन कथा सांगतो, ऐक.' १९. किरात देशी एक विमर्षण नावाचा राजा होता. तो क्षात्रधर्मात कुशल, कर्तृत्ववान्, सर्व जीवांचे हित जपणारा, देवद्विजांचा भक्त आणि साधूंचे अनुसरण करणारा होता.२०.

**स्त्रीलम्पटः प्राग्गुणतो निषिद्धभुक् । शैवोत्तमः शङ्कररूपचिन्तकः ।**
**तं प्राह साध्वी महिषी कथं शिवे । भक्तिर्दृढा धर्मविरुद्धचेष्ट ते ।।२१।।**

**।। राजोवाच ।।**

**पम्पापुरे श्वाभवमाद्यजन्यामुच्छिष्टमत्तुं शिवसद्म यातम् ।**
**हन्युर्जना द्वारि मृतिक्षणेऽजो । दृष्टोऽर्चितः प्रोज्वलिताश्च दीपाः ।।२२।।**
**प्रदक्षिणं तं हि परीत्य शैवे । दिने मृतस्तेन नृपोऽत्र शैवः ।**
**ये दुर्गुणास्ते श्वनिसर्गजोत्थाः । स्युः पूर्वसंस्कृत्यनुगो हि जीवः ।।२३।।**

शैव+उत्तमः शङ्कर+रूप+चिन्तकः (अपि) प्राक्+गुणतः स्त्री+लम्पटः निषिद्ध+भुक् (आस)। साध्वी महिषी तं प्राह, '(हे) धर्म+विरुद्ध+चेष्ट, ते शिवे दृढा भक्तिः कथम्?'२१। राजा उवाच। आद्य+जन्यां पम्पापुरे श्वा अभवम्। उच्छिष्टं अत्तुं शिव+सद्म यातं जनाः द्वारि हन्युः। मृति+क्षणे अर्चितः अजः, तं प्रदक्षिणं परीत्य हि, दृष्टः, प्रोज्वलिताः दीपाः च।२२। शैवे दिने मृतः तेन अत्र शैवः नृपः। ये दुर्गुणाः श्व+निसर्ग+ज+उत्थाः। जीवः पूर्व+संस्कृति+अनुगः स्युः।२३।

तो भगवान् शंकरांच्या रूपाचे सतत चिन्तन करणारा परम शिवभक्त असूनही पूर्वसंस्कारांमुळे स्त्रैण वृत्तीचा होता. तसेच त्याला अभक्ष्य भक्षणाचीही आवड होती. एकदा त्याच्या साध्वी पत्नीने - अभिषिक्त राणीने, त्याला विचारले, 'अहो, तुमचे आचरण असे धर्माविरुद्ध असूनही तुमची शंकरांच्या ठायी एवढी दृढ भक्ती कशी आहे?'२१. राजा उत्तरला, 'पूर्वजन्मी पंपापुरीत कुत्रा होतो. एकदा उष्टे-खरकटे कांही खायला मिळाले तर पाहावे म्हणून मी शंकराच्या देवळात जात असताना लोकांनी मला दारात मारून टाकले. मरताना माझी देवाला प्रदक्षिणा झाली, पूजा केलेल्या देवाचे दर्शन झाले आणि दारासमोर उजळलेले दीप दिसले.२२. तो दिवस सोमवार होता. त्या पुण्याईने मी हा शिवभक्त राजाचा जन्म पावलो आहे. माझे जे दुर्गुण आहेत श्वानस्वभावांतून आले आहेत.' भगवद्गीतेच्या वचनानुसार भौतिक शरीर आणि इंद्रिये यांच्या कर्तृत्वाला स्वभावच कारण असतो (*कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।।* १३:२०). विद्वान् किंवा

**प्राङ्मे जनिः क्वेति तयाह पृष्टः । प्राक्त्वां कपोतीं सति चञ्चुमांसाम् ।**
**चिल्लोऽहनच्छ्रीमदगे शिवाग्रे । प्राणार्पणान्मे महिषीह जाता ।।२४।।**
**क्वेतो भवान् यास्यसि चाप्यहं क्व । शंसेति पृष्टः स तु सिन्धुदेशे ।**
**राजा भविष्याम्यपि सृञ्जयोत्था । मत्स्त्री त्वमग्रेऽपि कलिङ्गजा त्वम् ।।२५।।**
**सौराष्ट्रकेऽहं खलु मागधी त्वं । गान्धारजावन्तिदशार्णजौ च ।**
**नृपोऽप्यनन्तोऽपि ययातिजा त्वं । पाण्ड्योऽहमग्रेऽपि विदर्भजा त्वम् ।।२६।।**

तया 'प्राक् मे जनिः क्व?' इति पृष्टः आह। '(हे) सति, प्राक् त्वां चञ्चु+मांसां कपोतीं चिल्लः श्रीमत्+अगे अहनत्। शिव+अग्रे प्राण+अर्पणात् इह मे महिषी जाता।'२४। 'इतः भवान् क्व यास्यसि? अहं च अपि क्व? शंस' इति पृष्टः सःतु, 'सिन्धुदेशे राजा भविष्यामि। त्वं सृंजय+उत्था मत्+स्त्रीः। अग्रे अपि त्वं कलिङ्ग+जा,'।२५। 'अहं सौराष्ट्रके। त्वं मागधी (अहं) गांधारजः। अवन्तिदशार्णजौ च। अनन्तः नृपः त्वं ययाति+जा। अग्रे अहं पाण्ड्यः त्वं अपि विदर्भजा।२६।

भक्तही असला तरी तो आपल्या स्वभावानुसारच रहाटतो (*सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।* भ.गीता ३:३३)२३. तेव्हा राणीने आणखी विचारले, 'माझा पूर्वजन्म कुठे झाला?' राजाने सांगितले, 'तू मागच्या जन्मात कपोती होतीस.तू एकदा चोचीत मांसाचा घास घेऊन उडत असता श्रीशैल्यावर एका घारीने तुला त्या मांसासाठी मारून टाकले. शंकरासमोर प्राण अर्पण केल्याने तू इथे माझी पट्टराणी झालीस.'२४. 'आता यापुढच्या जन्मात तुमची माझी गती काय असेल? मला सांगा,' असे राणीने विचारल्यावर राजा सांगू लागला. 'मी पुढील जन्मात सिंधुदेशाचा राजा होणार आहे आणि तुझा जन्म सृंजय देशाच्या राजाच्या पोटी होईल आणि पुन्हा तुझे माझ्याशीच लग्न होईल. त्यापुढच्या जन्मांत तू कलिंग देशाची राजकुमारी होशील.'२५. 'आणि मी सौराष्ट्रांत राजा होईन. चौथ्या जन्मात तू मगध देशाची राजकुमारी होशील गांधार देशात जन्मलेल्या माझ्याशी विवाह करशील. पाचव्या जन्मात अवन्ती आणि दशार्ण देशात जन्म घेऊन आपण लग्न करू. सहाव्या जन्मात मी अनन्तः नावाचा राजा होईन आणि तू ययातीची कन्या होऊन माझी पट्टराणी होशील. सातव्या जन्मात मी पांड्य देशाचा राजा आणि तू विदर्भाची राजकुमारी होशील.२६.

**स्मरोपमो धीगुणशीलशाल्यहं । वृत्वा तदा त्वां रतिभां स्वयंवरे ।**
**त्वया सहेष्ट्वा पुरुदक्षिणान्मखान् । सम्राट्तया प्राप्य सुतान्सुभोगयुक् ।।२७।।**
**लब्ध्वात्मतत्त्वं घटजाच्च जीवन्-मुक्तो भविष्यामि सह त्वयैवम् ।**
**राड्दम्पती वै प्रतिजन्म भूत्वा । मुक्तौ भविष्याव इति ह्यवोचत् ।।२८।।**
**शम्भोः पुरः साहजिकासुदानादेवं तिरश्चोऽपि गतिस्तु लोकाः ।**
**बुद्ध्वेदमायान्त्यपि देवता तु । स्थलानुमानात् खलु जागरूका ।।२९।।**
**इत्युक्त्वा धारयित्वेशः पादुके सङ्गमं क्षणात् । तमानीयेरयद् ग्रामं प्रहृष्टः प्रययौ स तु ।।३०।।**

स्मर+उपमः धी+गुण+शील+शाली अहं रति+भां त्वां स्वयंवरे वृत्वा, त्वया सह पुरु+दक्षिणान् मखान् इष्ट्वा सम्राट्तया सुतान् प्राप्य सुभोग+युक्।२७। घटजात् आत्मतत्त्वं लब्ध्वा जीवन्मुक्तः भविष्यामि। एवं त्वया सह प्रतिजन्म वै राट्+दम्पती भूत्वा मुक्तौ भविष्याव।' इति हि अवोचत्।२८। 'शम्भोः पुरः साहजिक असु+दानात् तिरश्च अपि एवं गतिः। लोकाः तु इदं बुद्ध्वा आयान्ति। देवता तु स्थल+अनुमानात् जागरूका खलु'।२९। इति उक्त्वा ईशः तं पादुके धारयित्वा क्षणात् सङ्गमं आनीयेरयत्। सः तु प्रहृष्टः ग्रामं ययौ।३०।

मी मदनासारखा सुंदर, बुद्धिमान, गुणवान् सुशील असेन आणि रतीसम रूपवान अशा तुझ्याशी स्वयंवरात लग्न करीन. तुझ्यासह मी सम्राट होऊन अनेक मोठमोठे यज्ञ करीन. अमरकोशानुसार (२:७:३), 'जो राजसूय यज्ञ करतो, राजमंडलाचा अधिपती असतो आणि ज्याच्या आज्ञेने राजे लोक शासन करतात तो सम्राट.' आपण सर्व ऐहिक सुखांचा भोग घेऊ. आपल्याला अनेक पुत्र होतील.२७ उतारवयात मी अगस्ती महर्षींकडून आत्मज्ञान प्राप्त करीन जीवन्मुक्त होईन. अशा रीतीने तुझ्यासह प्रत्येक जन्मात राजाराणी होऊन आपण मुक्त होऊ.'२९. तंतुकाला श्रीगुरू सांगतात, 'शिवमंदिरासमोर नैसर्गिक प्राणदानानेसुद्धा पशु-पक्ष्यांना अशी गती लाभते. (मग संकल्पपुरःसर जपतपादि करणाऱ्या मनुष्यांचे फळ किती असेल?) हे जाणून लोक श्रीशैल्याला येतात. तात्पर्य देवता स्थानाच्या प्रभावानुसार जागरूक असतात.'२९. इतके बोलून श्रीगुरूंनी तंतुकाला पुन्हा पादुका धरायला लावून क्षणभरात संगमावर आणले. तो हर्षोत्फुल्ल चित्ताने गाणगापूराला गेला.३०.

**तत्रत्याः सङ्गमेऽदृष्ट्वा गुरुं खिन्ना अवेक्ष्य तम् । आयान्तमब्रुवन्यान्तः कस्मात् क्षौरं कृतं त्वया ॥३१॥**
**स प्राह मां क्षणान्नीत्वा श्रीशैलं भो यथाविधि । क्षेत्राचारं कारयित्वा सम्प्रत्यत्रानयत्प्रभुः ॥३२॥**
**तच्छ्रुत्वात्रैष मध्याह्ने दृष्टो ब्रूते मृषेति ते । मत्वैत्य सङ्गमे तत्र निशि सर्व उपोषिताः ॥३३॥**
**चक्रुर्जागरणं शैव-नामोच्चारणपूर्वकम् । ततः शैलाज्जनः प्राप्तः पक्षात्स प्राह विस्मितः ॥३४॥**
**श्रीशैलेऽयं शिवद्वारि तन्तुकः सकृदीक्षितः । तदा सप्रत्ययाः सर्वे ननन्दुर्विस्मिता भृशम् ॥३५॥**

तत्रत्याः गुरुं सङ्गमे अदृष्ट्वा खिन्ना यान्तः तं आयान्तं अवेक्ष्य अब्रुवन् 'त्वया कस्मात् क्षौरं कृतम्?'।३१। सः प्राह, 'भो, प्रभुः मां क्षणात् श्रीशैलं नीत्वा, यथाविधि क्षेत्र+आचारं कारयित्वा सम्प्रति अत्र आनयत्'।३२। तत् श्रुत्वा ते 'एष मध्य+अह्ने दृष्टः, मृषा ब्रूते' इति मत्वा सङ्गमे एत्य तत्र निशि सर्व उपोषिताः।३३। शैव+नाम+उच्चारण+पूर्वकं जागरणं चक्रुः। ततः पक्षात् शैलात् जनः प्राप्तः। सः विस्मितः प्राह।३४। 'अयं तन्तुकः श्रीशैले शिव+द्वारि सकृत् ईक्षितः। तदा सर्वे स+प्रत्ययाः भृशं विस्मिताः ननन्दुः।३५।'

तंतुक त्वरेने गावाकडे जात असता, श्रीगुरू संगमावर नसल्याने खिन्न होऊन गावाकडे परतणारे तेथील लोक त्याला भेटले. त्यांनी त्याला येताना पाहून विचारले, 'अरे, तू हे क्षौर कशासाठी केलेस?'३१. तो म्हणाला, 'अहो, श्रीगुरुमहाराजांनी मला आज क्षणार्धात श्रैशैल्याला नेले. माझ्याकडून यथाविधी सर्व क्षेत्राचार करविला; आणि आत्ताच थोड्या वेळापूर्वी मला परत आणले!'३२. ते ऐकून त्या लोकांनी विचार केला की 'आत्तां दुपारीच तर याला इथे पाहिला. थापा मारतोय.' मग ते सर्व संगमावर आले. शिवरात्रीचा उपास करून रात्री(३३) शिवनामाच्या भजनाच्या गजरांत जागरण केले. पंधरा दिवसांनी तंतुकाचे भाऊबंद श्रीशैल्याहून परतले. त्यांनी सांगितले, 'हा तंतुक श्रीशैल्याला मंदिरासमोर एकदा पाहिला होता खरा!' तेव्हा सर्वांना श्रीगुरूंच्या सामर्थ्याचा प्रत्यय येऊन नवल वाटले आणि आनंदही झाला.३५.

**सद्गुरोः सेवया बाढं कर्मबन्धं निहत्य सः । सिषेवे परमानन्दं यत्र नो द्वन्द्वसाध्वसम् ।।३६।।**
**एकैकयापि भक्त्यैवं मुक्ताः कति न वेद तान् । कवी शिष्यावभूतां तौ मुक्तौ श्रीगुरुकीर्तनात् ।।३७।।**
**गुरुलीलामयास्ताभ्यां प्रभूता ग्रथिताः कथाः । तल्लीला वक्ति कः कात्स्न्र्याद्यत्र वेदोऽपि शङ्कितः ।।३८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कौ शिष्यौ सद्गुरोर्जातौ तन्मे कथय सादरम् । वक्ता हि श्रोतृपृच्छाशीः स्मृतिमेति यतः कथा ।।३९।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**नन्दिशर्मा द्विजः कश्चित् कुष्ठार्तः तुलजापुरि । त्र्यब्दं तेपे तपः स्वप्ने देव्योक्तं गच्छ चेश्वरीम् ।।४०।।**

सद्गुरोः सेवया कर्म+बन्धं बाढं निहत्य परम+आनन्दं सिषेवे यत्र द्वन्द्व+साध्वसं नो।३६। एवं एक+एकया अपि भक्त्या कति मुक्ताः तान् न वेद। कवी शिष्यौ अभूतां तौ श्रीगुरु+कीर्तनात् मुक्तौ।३७। ताभ्यां ग्रथितां गुरु+लीला+मयाः कथाः प्रभूताः। यत्र वेदः अपि शङ्कितः तत् लीलाः कः कात्स्न्र्यात् वक्ति?३८। नामधारक उवाच। 'सद्गुरोः कौ शिष्यौ जातौ तत् सादरं मे कथय। वक्ता हि श्रोतृ+पृच्छ+आशीः यतः कथा स्मृतिं एति।'३९। सिद्ध उवाच। 'कश्चित् नन्दिशर्मा कुष्ठ+आर्तः द्विजः तुलजा+पुरि त्रि+अब्दं तपं तेपे। देव्या स्वप्ने उक्तं च 'ईश्वरीं गच्छ'।४०।

त्या तंतुकाने पुढे सद्गुरूंची सेवा करून आपले कर्मबंधन पूर्णपणे तोडून टाकले. द्वैताचे भय मागे टाकून निरतिशय परमानंदात निमग्न झाला.३६. अशा रीतीने नऊ भक्तींपैकी एका एका भक्तीनेही किती मुक्त झाले याची गणती नाही. दोन कवी श्रीगुरूंचे शिष्य झाले. श्रीगुरूंच्या लीला गाऊन कीर्तनभक्तीने ते मुक्त झाले.३७. अर्थात् ज्याचे गुण गाता गाता वेदही अचंबित झाले त्याच्या लीला पूर्णतया कोण सांगू शकेल?३८. नामधारक म्हणाला, 'महाराज, श्रीगुरूंच्या लीला गाणारे ते कोण शिष्यद्वय झाले ते ऐकण्यास मी सादर आहे. आपणच (३ऱ्या अध्यायांत) म्हणाल्याप्रमाणे वक्त्यालासुद्धा कथा आठवण्यासाठी प्रश्नाची अपेक्षा असते.'३९. सिद्धांनी सांगायला सुरुवात केली, 'एका नन्दी नावाच्या ब्राह्मणाला कुष्ठ झाले. त्याच्या परिहारासाठी त्याने तुळजापूरला देवीपुढे तीन वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा त्याला देवीने स्वप्नांत चंदला परमेश्वरीकडे जायला सांगितले.'४०.

**स चन्दलेश्वरीं प्राप्य सप्तमासं तपोऽतपत् । तयाप्युक्तं यतिं गच्छ स्थितं भीमामरायुतौ ।।४१।।**
**स प्राह तां गच्छ मर्त्यमिति वक्तुं न लज्जसे । परीक्षितं त ऐश्वर्यमियत्कष्टं कुतोऽर्पितम् ।।४२।।**
**इत्युक्त्वा स तपस्तेपे भक्तैर्देव्या स हापितः । यद्भव्यं तद्भवत्वेव कष्टमेतावदर्जितम् ।।४३।।**
**देव्याज्ञया तथैवाल्पं सह भोग्यमिति द्विजः । मत्वा स्वगतमानम्य देवीं भुक्तो ययौ यतिम् ।।४४।।**
**गन्धर्वपुरमासाद्य स यतिः क्वेत्यपृच्छत । पापं मत्वार्जुनाभं तं कुष्ठिनं नोत्तरं ददुः ।।४५।।**

सः चन्दल+ईश्वरीं प्राप्य सप्त+मासं तपः अतपत्। तया अपि उक्तं, 'भीमा+अमरा+युतौ स्थितं यतिं गच्छ।'४१। सः तां प्राह। 'मर्त्यं गच्छ इति वक्तुं न लज्जसे (किम्)? ते ऐश्वर्यं परीक्षितम्। इयत् कष्टं कुतः अर्पितम्?'४२। इति उक्त्वा सः तपः तेपे। देव्या भक्तैः सः हापितः। 'यत् भव्यं तत् भवतु एव। एतावत् कष्टं अर्जितम्।४३। देव्या आज्ञया तथा एव अल्पं सह भोग्यम्' इति स्वगतं मत्वा द्विजः देवीं आनम्य भुक्तः यतिं ययौ।४४। गन्धर्वपुरं आसाद्य सः 'यतिः क्व?' इति अपृच्छत। तं अर्जुन+आभं कुष्ठिनं पापं मत्वा उत्तरं न ददुः।४५।

देवीच्या आज्ञेप्रमाणे नन्दीने चंदला परमेश्वरीला जाऊन सात महिने तप केले. ईश्वरीनेही त्याला सांगितले की, 'भीमाअमरजा संगमावर संन्यासी आहेत. त्यांच्याकडे जा.'४१. त्यावर नन्दीने देवीला विचारले, 'मर्त्य मानवाकडे मला पाठवायला तुला लाज वाटत नाही का? बघितलं तुझं देवपण! हेच सांगायचे होते तर इतके कष्ट का दिलेस?'४२. असे बोलून त्याने पुन्हा देवीपुढे तप सुरू केले. तेव्हा देवीच्या भोप्यांनी त्याला देवीच्या आदेशाने देवळाबाहेर हाकलून दिले. मग त्याने विचार केला की 'जे व्हायचे होऊ दे. इतके कष्ट केलेत तर देवीच्या आज्ञेप्रमाणे आणखी एक वेळ प्रयत्न करून पाहू.' देवीला नैवेद्य करून पारणा केली आणि गाणगापुरास गेला.४४. तिथे जाऊन त्याने चौकशी केली की 'इथे संन्यासी कुठे आहेत?' पण त्याचे कुष्ठामुळे सर्वांग अर्जुन वृक्षासारखे पांढरे झालेले पाहून अशुभशंकेने कुणी त्याच्याशी बोलेना.४५.

**तं कश्चिदाह स्नात्वारं शिवरात्रिव्रतस्य च । पारणायै मठे देव आयास्यत्यत्र तिष्ठ भोः ।।४६।।**
**अत्रान्तरे प्रभुः प्राप मठं भक्तास्तमब्रुवन् । द्विजोऽर्जुनश्वेतदेह इदानीं कश्चिदागतः ।।४७।।**
**विश्वसाक्षी तमाहूय प्राह हित्वामरान्नरम् । आयातोऽसि कुतोऽर्हः किं दोषोत्थस्थास्नुरुग्हृतौ ।।४८।।**
**तच्छ्रुत्वा मत्कृतं ज्ञातमनेनैष न मानुषः । प्रत्यक्षः परमात्मेति मत्वोचे तं क्षमाप्य सः ।।४९।।**
**मूढोऽहं कुत्सितमतिः पापात्मा पापसम्भवः । शरण्यं त्वां प्रपन्नोऽस्मि दयाब्धिं भक्तवत्सलम् ।।५०।।**

कश्चित् तं आह, 'देव स्नात्वा शिवरात्रि+व्रतस्य पारणायै मठे आयास्यति। भोः अत्र तिष्ठ'।४६। अत्र+अन्तरे प्रभुः मठं प्राप। भक्ताः तं अब्रुवन्। 'इदानीं कश्चित् अर्जुन+श्वेत+देह द्विजः आगतः।'४७। विश्व+साक्षी तं आहूय प्राह, 'अमरान् हित्वा नरं कुतः आयातः असि? दोष+उत्थ+स्थास्नु+रुक्+हृतौ (नरः) अर्हः किम्?'४८। तत् श्रुत्वा, 'अनेन मत्+कृतं ज्ञातम्। एष न मानुषः, प्रत्यक्षः परमात्मा।' इति मत्वा सः तं क्षमाप्य।४९। 'अहं मूढः कुत्सित+मतिः पाप+आत्मा पाप+संभवः त्वां शरण्यं दया+अब्धिं भक्त+वत्सलं प्रपन्नः अस्मि।'५०।

कुणी तरी त्याला म्हणाले, 'गुरुदेव स्नानादि उरकून शिवरात्रीच्या पारण्यासाठी मठात येतील. तुम्ही इथेच थांबा.'४६. एवढ्यात प्रभू मठाला आलेच. भक्तांनी त्यांना सांगितले, 'आत्ता इथे एक अर्जुनाच्या झाडाप्रमाणे पांढरा शुभ्र ब्राह्मण आलेला आहे.' विश्वसाक्षी श्रीगुरूंनी त्याला बोलावून विचारले. 'देवाला सोडून माणसाकडे कसे आलात? दीर्घकाल स्थिरावलेल्या रोगाचा परिहार मर्त्य मानव करण्याला समर्थ असेल का?'४८. ते ऐकून नंदी चमकला. 'यांनी माझा इतिहास आणि माझे मन ओळखले. हे सामान्य मानव नाही. हे तर साक्षात् परमात्मा आहेत!' असा विचार करून त्याने त्यांची क्षमा मागितली.४९. तो म्हणाला, 'मी मूर्ख आहे, कुबुद्धी आहे, पापी आहे आणि पापापासूनच उपजलेला आहे. दयासागरा, भक्तवत्सला, आपणच योग्य आश्रय आहात असे जाणून मी आपल्याला शरण आलो आहे.'५०.

**मयि कुष्ठं समुत्पन्नं विवाहोर्ध्वं तदैव तु । पितृदारैरपि परि-त्यक्तं मां कोऽपि नेक्षते ।।५१।।**
**नाङ्गीकुर्वन्त्यपि सुरा भात्यतोऽपि मृतिर्वरम् । परात्मना त्वया नोचेत्स्वीकृतोऽत्र जहाम्यसून् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीः पापोत्थरोगोऽयमियत्कालमनेन तु । भुक्तं पापमतो भक्तिर्मयि जाताचलामला ।।५३।।**
**अत्रास्ते सङ्गमे तीर्थ-राजोऽघौघविनाशनः । तत्र स्नाहीति संभाष्य सोमनाथमथाब्रवीत् ।।५४।।**
**विधिवत्कारयित्वा षट्-कूलतीर्थे सचैलकम् । अश्वत्थमर्चयित्वा द्राक् सोमनाथामुमानय ।।५५।।**

'विवाह+ऊर्ध्वं मयि कुष्ठं समुत्पन्नम्। तदा एव तु पितृ+दारैः अपि मां परित्यक्तम्। मां कः अपि न ईक्षते।'५१। 'सुराः अपि न अङ्गीकुर्वन्ति। अतः मृतिः अपि वरं भाति। त्वया पर+आत्मना नो स्वीकृतः चेत् अत्र असून् जहामि'।५२। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अयं पाप+उत्थ+रोगः। इयत् कालं अनेन पापं भुक्तम्। अतः मयि अचला अमला भक्तिः जाता।५३। अत्र सङ्गमे अघ+ओघ+विनाशनः तीर्थ+राजः आस्ते। तत्र स्नाहि।' इति संभाष्य अथ सोमनाथं अब्रवीत्।५४। 'सोमनाथ, अमुं षट्कूलतीर्थे विधिवत् सचैलं (स्नानं) कारयित्वा, अश्वत्थं अर्चयित्वा द्राक् आनय।'५५।

नन्दी सांगू लागला, 'लग्नाच्या नंतरच मला हे कोड फुटले. त्याच वेळी माझे आईवडील आणि पत्नीनेही माझा त्याग केला. माझ्याकडे कुणी पाहातसुद्धा नाहीत'५१. 'माणसांचे सोडा, देवही मला उबगतात. ह्यापेक्षा मरण बरे असे वाटते. हे परमात्मा, आपण जर माझा अङ्गीकार केला नाही तर मी आता इथेच (प्रायोपवेशनाने) प्राणत्याग करीन.'५२. श्रीगुरू त्याला धीर देत म्हणाले, 'हा (पूर्वजन्मकृत) पापांतून उद्भवलेला रोग आहे. आता इतक्या दिवसात ते पाप भोगून झाले आहे. म्हणूनच तुला माझ्या ठिकाणी दृढ आणि शुद्ध भक्ती उपजली आहे.५३. 'इथे संगमावर पापांच्या राशींचा नाश करणारा तीर्थराज आहे. तिथे स्नान कर.' असे त्याला समजावून श्रीगुरू सोमनाथाला (गंगेचा पती) म्हणाले.५४. 'सोमनाथ, ह्याला संगमावर नेऊन षट्कूलांत विधिपूर्वक वस्त्रासहित स्नान करवा. तसेच अश्वत्थाची पूजाही याच्याकडून करून घ्या आणि इथे आणा.'५५.

**सोऽप्युक्तवत् कारयित्वा तमानीय गुरोः पदे । उपानयत्तमाहेशः पश्योत्तिष्ठाखिलं वपुः ।।५६।।**
**स्वर्णीभूतं स तु स्वाङ्गमुत्थायोद्वीक्ष्य विस्मितः । किञ्चित्कुष्ठाङ्किताष्ठीवद् गुरुं प्राञ्जलिरब्रवीत् ।।५७।।**
**भगवन्किं कृतं त्वेतत् कुष्ठं शिष्टं कुतोऽल्पकम् । तच्छ्रुत्वा सस्मितं प्राह त्वत्संशयफलं त्विदम् ।।५८।।**
**इत्याश्राव्य गुरोर्वाक्यं प्रणिपत्याब्रवीद्वचः । सुधाप्यम्बुधिया पीता मृतिं नयति किं दवः ।।५९।।**
**स्प्रष्टाऽवित्वाद्दहत्यल्पं स्वभावं परिहृत्य किम् । हरे स्वभावः पूर्णत्वं तवानेनैति किं वद ।।६०।।**

सः अपि उक्त+वत् कारयित्वा तं आनीय गुरोः पदे उपानयत्। तं ईशः आह, 'उत्तिष्ठ अखिलं वपुः पश्य।'५६। सः तु उत्थाय स्वर्णीभूतं स्वाङ्गं किञ्चित्+कुष्ठ+अङ्कित अष्ठी+वत् उद्वीक्ष्य विस्मितः प्राञ्जलिः गुरुं अब्रवीत्।५७। 'भगवन्, एतत् तु किं कृतम्? अल्पकं कुष्ठं कुतः शिष्टम्?' तत् श्रुत्वा सस्मितं (श्रीगुरुः) प्राह 'इदं त्वत्+संशय+फलम्।'५८। इति गुरोः वाक्यं श्रुत्वा प्रणिपत्य वचः अब्रवीत्। 'सुधा अम्बु+धिया पीता अपि मृतिं नयति किम्? दवः।५९। अवित्वात् स्प्रष्टा स्वभावं परिहृत्य अल्पं दहति किम्? हरे, तव स्वभावः अनेन पूर्णत्वं एति किम्? वद।'६०।

सोमनाथाने श्रीगुरूंच्या आदेशानुसार सर्व करून नन्दीला आणले आणि श्रीगुरूंसमोर उभे केले. त्याने साष्टांग नमस्कार केला. त्याला प्रभू म्हणाले, 'ऊठ, तुझे सर्व अंग नीट न्याहाळून पाहा.'५६. त्याने उठून आपले सर्व अंग निरोगी आणि सुवर्ण झालेले पाहिले; पण गुडघ्यावर किंचित् कोड राहिलेले दिसले.५७. तेव्हा तो काकुळतीने म्हणाला, 'भगवंता, हे आपण काय बरे केलेत? हे थोडेसेच कुष्ठ का शिल्लक ठेवलेत?' सद्गुरूंनी किंचित् स्मित केले आणि म्हणाले, 'अरे, हे तुझ्या संशयाचे फळ आहे!'५८. हे श्रीगुरूंचे वचन ऐकून नन्दी म्हणाला, 'हे पाणी आहे अशा समजुतीने अमृत प्याल्याने ते मृत्यूला कारण होईल का?'५९. 'अग्नीला अजाणता स्पर्श केला तर ते थोडे कमी भाजेल का? हे हरे, हा दोष अवशिष्ट राहिल्याने आपल्या स्वभावाला परिपूर्णता येईल का?' इथे **'हरे'** हे संबोधन हेतुपुरःसर आहे. पापाचे निर्मूलन करणारा तो हरी. हरीच्या नामात पापाचे निर्हरण करण्याची जितकी शक्ती आहे तेवढे पाप करण्याचे सामर्थ्य कुणाही पातक्याचे नाही (*नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी नरः।।* स्कंद पुराण, वैष्णव खंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३)६०.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**यद्भावो यादृशः क्वापि नान्यथा स्यात्स्वदोषतः । ग्रहीतुर्भात्यन्यथार्के जन्मान्धस्येव शून्यता ।।६१।।**
**मर्त्येन मम किं भूयादिति शङ्कोदिता त्वयि । तत्फलं त्विदमस्त्येकः प्रतीकारोऽत्र तं कुरु ।।६२।।**
**श्रुतिबृंहितया सिद्ध्येत् पुरुष्टुत्या त्वमर्त्यता । भविष्यत्यनया शुद्धिस् त्वं कृतार्थो भविष्यसि ।।६३।।**
**तच्छ्रुत्वा दीनवाग्लोलत्सर्वापघन आह तम् । स्वामिन् सर्वान्तरस्थस्त्वं किं वाच्यं तेऽग्रतः प्रभो ।।६४।।**
**लिपिमप्यक्षमो ज्ञातुं कथं स्तौमि पुरुष्टुत । अन्यत्किमपि कर्तुं मां यथास्वं विनियोजय ।।६५।।**

यत्+भावः यादृशः, न क्व अपि अन्यथा स्यात्। ग्रहीतुः स्वदोषतः जन्म+अन्धस्य अर्के शून्यता इव,अन्यथा भाति।६१। 'मर्त्येन मम किं भूयात्?' इति शङ्का त्वयि उदिता। इदं तु तत्+फलं अस्ति। अत्र एकः प्रतीकारः, तं कुरु।६२। श्रुति+बृंहितया पुरु+ष्टुत्या तु अमर्त्यता सिद्ध्येत। अनया शुद्धिः भविष्यति। त्वं कृत+अर्थः भविष्यसि।६३। तत् दीन+वाक् लोलत्+सर्व+अपघन तं आह। '(हे) स्वामिन् त्वं सर्व+अन्तर+स्थः। (हे) प्रभो, ते अग्रतः किं वाच्यम्?'६४। (हे) पुरुष्टुत, लिपिं अपि अक्षमः (अहं) कथं स्तौमि? किं अपि अन्यत् मां यथास्वं कर्तुं विनियोजय।६५।

ज्याचा जसा स्वभाव असतो तो कधीही वेगळा होत नाही. मात्र ग्राहकाच्या दोषामुळे वेगळा भासू शकतो. सूर्य स्वभावतः प्रकाशमान आहे. तो प्रकाशरहित कधीच होणार नाही. जन्मांधाला मात्र तो प्रकाश दिसू शकत नाही. हा त्याचा दोष आहे. न सूर्याचा न प्रकाशाचा.६१. तू इथे येतांना 'हा मर्त्य मानव माझा रोग काय दूर करील?' अशी शंका घेऊन आलास. हे त्याचेच फळ आहे. त्याला एक उपाय मी सांगतो तो कर.६२. उपनिषदांचा अर्थ विशद करणारी प्रगल्भ स्तुती कर. तिच्याद्वारा माझे तसेच तुझेही अमर्त्यत्व (ब्रह्मत्व) सिद्ध होईल. त्यायोगे तुझी शुद्धी होऊन तू कृतार्थ होशील.६३. तेव्हा श्रीगुरूंसमोर तो नंदी सर्वांगांनी लोळण घेत दीनवाण्या वाचेने म्हणाला, 'स्वामी, आपण सर्वांतर्यामी आहात. आपल्याला सांगायचे?'६४. 'आपली थोरामोठ्यांनी प्रगल्भ स्तुती केली आहे. मला धड लिहावाचायलाही येत नाही, मी कशी आपली स्तुती करणार? आपण दुसरे कांही मला झेपेल असे करायला सांगा.'६५.

**प्रभुः प्राह सकृद्वक्त्रान् निर्गतं न पुनर्वचः । ममान्तः प्रविशत्येव दन्तावलरदोपमम् ।।६६।।**
**उक्तमेव त्वया कार्यमित्युक्त्वा भस्म मन्त्रितम् । प्रक्षिप्य तन्मुखे प्राह स्तुहि नानाविधोक्तिभिः ।।६७।।**
**सोऽपि गीष्पतिवद्भूत्वा तं स्तोतुमुपचक्रमे । प्रेमगौरवनम्राङ्गो हर्षगद्गदया गिरा ।।६८।।**

प्रभुः प्राह। सकृत् मम वक्त्रात् निर्गतं वचः, दन्तावल+रद+उपमं, न एव पुनः अन्तः प्रविशति।६६। त्वया उक्तं एव कार्यम्। इति उक्त्वा मन्त्रितं भस्म तत्+मुखे प्रक्षिप्य आह, 'नानाविध उक्तिभिः स्तुहि।'६७। सः अपि गीष्पति+वत् भूत्वा प्रेम+गौरव+नम्र+अङ्गः हर्ष+गद्गदया गिरा स्तोतुं उपचक्रमे।६८।

प्रभू म्हणाले, 'माझ्या मुखातून एकदा बाहेर पडलेले वचन, हत्तीच्या सुळ्यांप्रमाणे, परत आत जात नाही.६६. तुला जे सांगितले आहे तेच करायला पाहिजे.' असे बोलून त्याला जवळ बोलावून श्रीगुरूंनी त्याच्या तोंडात अभिमंत्रण केलेले भस्म टाकले आणि म्हणाले, 'विविध वचनांनी माझी स्तुती कर.'६७. तो नन्दीही जणू बृहस्पतीसारखा वक्ता झाला. प्रेमभराने त्याचे अंग लवले आणि दाटलेल्या कंठाने त्याने स्तवनाला आरंभ केला.६८.

**आत्मा आणि ब्रह्म -** श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणेच तो उपनिषदांचा अर्थ स्पष्ट करणारी स्तुती करीत आहे. 'आपण **साक्षात्** - इंद्रियनिरपेक्ष अंतःस्थित असे **तत्त्व** आहात. मायेचे ईक्षण करणारे जगताचे **कर्ता** आहात. जीवमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार पोषण करणारे **भर्ता** आहात; नित्य तसेच अविनाशी आहात.' नित्य आणि अविनाशी तत्पद आपणच आहात तसेच त्वंपदवाच्य कर्ता आणि भर्ताही आहात. इथे अशी शंका घेतली की सांख्यांच्या प्रतिपादनानुसार, आत्मा असंग आहे. बुद्धीतच सर्व क्रियांचा उगम आहे. मग त्याला कर्ता कसे म्हणता येईल? बुद्धी हे जीवाचे करण (instrument) आहे. झाड तोडताना उपयोगात आणलेल्या कुऱ्हाडीला जसे कर्तत्व येत नाही तसेच बुद्धीलाही येत नाही. ब्रह्मसूत्रांतही (२:३:३३) लौकिक, वैदिक सर्व क्रियांचे कर्तृत्व जीवाचेच आहे. शास्त्रांच्या आज्ञासुद्धा जीवाला उद्देशूनच आहेत.

**साक्षात्तत्त्वमसीश त्वं कर्ता भर्ताव्ययो ध्रुवः । त्वं सर्वं खल्विदं ब्रह्मास्यात्मा साक्षी जगन्मयः ।।६९।।**
**धिया गुणैस्त्रिधाभूतात् स्वभेदात् सत्त्वलक्षणात् । भूतान्युद्भाव्य सर्वात्मन् विश्वं सृष्टं चराचरम् ।।७०।।**
**मायामयं ह्यस्वतन्त्रं वित्पात्रं कल्पितोऽत्र ना । सोऽपि त्वन्मायया भ्रान्तो भूत्वा संकल्पवान्सदा ।।७१।।**

(हे) ईश, त्वं साक्षात् तत्त्वं असि। कर्ता, भर्ता, ध्रुवः, अव्ययः (असि)। त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म आत्मा साक्षी जगत्+मयः असि।६९। धिया सत्त्व+लक्षणात् स्व+भेदात् गुणैः त्रिधाभूतात् भूतानि उद्भाव्य चराचरं विश्वं सृष्टम्।७०। माया+मयं हि अस्वतन्त्रं (विश्वम्)। अत्र वित्+पात्रं ना कल्पितः। सः अपि त्वत् मायया भ्रान्तः सदा सङ्कल्प+वान् भूत्वा,।७१।

'**तत्त्वमसि**' या महावाक्याचा उच्चार केल्यावर त्याच्या विचारासाठी शम आवश्यक आहे. म्हणून **सर्वं खल्विदं ब्रह्म** असा छांदोग्य उपनिषदांतील (३:१४:१) शमवाक्याचा निर्देश केला आहे. *तज्जलान् ज* म्हणजे जनकत्व, *ल* म्हणजे लयत्व आणि *अन्* अनन्यत्व यांच्यामुळे हे सर्व ब्रह्मच आहे. अशा ब्रह्मात रागद्वेषांचा संभवच असू शकत नाही. म्हणून त्याच्या उपासनाकाळात शांत राहावे. शांत राहून कशाचे चिंतन करावे? त्यासाठी सांगतात की व्यापक **आत्मा** चिंतनीय आहे. तो **साक्षी** म्हणचे द्रष्टा - पाहणारा आहे. तो काय पाहतो? तो हे सर्व दृश्य **जगत्** पाहतो, जे त्याच्याच अधिष्ठानावर स्थित आहे. त्याच्या सत्तेवाचून अन्य कोणतीच सत्ता नाही. म्हणून त्याला **जगन्मय** म्हटले आहे.६९.

**विश्वाची सृष्टी -** हे विश्वात्मन्, **धिया** म्हणजे जगताचे उपादान जी माया तिने युक्त अशा महत्तत्त्व नावाची समष्टी बुद्धी, तिच्यापासून सत्त्वप्रधान त्रिगुणांनी त्रिधा झालेल्या अहंकारापासून आकाशादि पंचमहाभूतांची कल्पना (रचना) केली आणि त्यांपासून हे विश्व निर्माण केले.७०.

**संसरण -** ह्या मायामय आणि परतंत्र विश्वात (आत्म)ज्ञानाची क्षमता असलेला मानव निर्माण केला. पण तोसुद्धा तुझ्या मायेला भुलून निरंतर संकल्पाच्या चक्रात सापडून,(७१)

**यात्यधो विस्मृतात्मा सत्-कर्मायत्तो वियोनिषु । भ्रमते भुक्तनिरयः कल्पेऽपि वासनाहृदा ।।७२।।**
**स्थित्वोद्भवति कल्पादौ प्राग्वत्सत्कर्मवानपि । गत्वोर्ध्वं पतति क्षीण-पुण्योऽधश्चन्द्रमण्डले ।।७३।।**
**ततोऽप्योषधिगो भूत्वा पुंसि रेतस्ततोऽप्यसौ । स्त्रीपुंयोगाच्छुक्ररक्त-मयो गर्भत्वमेत्यहो ।।७४।।**
**कललं प्राक् पञ्चरात्राद् बुद्बुदः सप्तरात्रतः । पेशी पक्षादर्बुदोऽथ भवति स्वस्थितो घनः ।।७५।।**

विस्मृत+आत्मा अधः याति। असत्+कर्म+आयत्तः भुक्त+निरयः वियोनिषु भ्रमते। कल्पे अपि वासना+हृदा।७२। स्थित्वा प्राक्+वत् सत्+कर्मवान् अपि ऊर्ध्वं गत्वा क्षीण+पुण्यः अधः चन्द्र+मण्डले पतति।७३। ततः अपि ओषधि+गः पुंसि रेतः ततः अपि असौ स्त्री+पुं+योगात् शुक्र+रक्त+मयः गर्भत्वं एति अहो। प्राक् कललं, पञ्चरात्रतः बुद्बुदः, सप्तरात्रतः पेशी, पक्षात् अर्बुदः स्वस्थितः घनः भवति।७५।

आपल्या स्वरूपाला विसरला. इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी ब्रह्मसूत्राच्या तिसऱ्या अध्यायातील प्रथम पादांत सहा अधिकरणांनी प्रतिपादलेल्या संसाराचे अनुसंधान करायला सांगितले आहे. ह्यात जीवाच्या देहांतरगमनाचे वर्णन आहे. आत्मविस्मृती झालेला हा जीव पापे करून नरक भोगतो आणि नंतर विविध योनीत फिरत राहतो. अंतःकरण वासनांनी व्याप्त असेपर्यंत तो कल्पांतापर्यंत भ्रमण करतो.७२. पुनः पुढच्या कल्पात तो पूर्वीच्याच वासना घेऊन जन्माला येतो. जर त्याच्याकडून पुण्यकर्मे झाली तर ऊर्ध्व गती लाभून तो स्वर्गात जाऊन पुण्यफळांचा भोग घेतो. ती पुण्याई संपली की परत चंद्रमंडलात पडतो.७३. चंद्रलोकापासून परतीचा, पर्जन्य, वनस्पती, पुरुषाचे रेत आणि स्त्रीचे रज हा क्रम वर सांगितला आहे. ह्या क्रमाला पंचाग्निक्रम असे नाव आहे. सूर्याच्या अग्नीत श्रद्धेचा हवि अर्पण करून सोमाची उत्पत्ती होते. वरुणाच्या अग्नीत सोमाचा हवि अर्पण करून पर्जन्याची उत्पत्ती होते. पृथ्वीच्या अग्नीत पर्जन्याचा हवि अर्पण करून अन्नाची उत्पत्ती होते. पुरुषाच्या अग्नीत अन्नाची आहुती घालून रेताची उत्पत्ती होते. आणि स्त्रीरूपी अग्नीत रेताची आहुती टाकल्याने गर्भाची उत्पत्ती होते. यापुढील श्लोकात केलेले गर्भधारणा आणि गर्भसंवर्धनाचे संक्षिप्त वर्णन बऱ्याच प्रमाणात आधुनिक गर्भवृद्धिशास्त्राशी जुळते.७४. क्रमाने शुक्र आणि शोणिताच्या संयोगाने झालेला हा गर्भ पहिल्या दिवशी कलल (amorphous), पाच रात्रीतून बुडबुडा, सात रात्रींनी अंडाकार, पंधरा दिवसांनी पिशवीसारखा होऊन षट्कोशांत स्थिरावतो आणि घन (viscid) होतो.७५.

**मासा क्रूरः शिरो द्वाभ्यां ग्रीवाद्यङ्गानि च त्रिभिः । चतुर्भिस्त्वग्रोमनखाः पञ्चभिः षड्भिरप्यथ ॥७६॥**
**नासास्याक्ष्यादिरन्ध्राणि सप्तभिश्चलनं च धीः । अष्टभिर्नवभिः पूर्णो देही भूत्वेश्वरं जगौ ॥७७॥**
**जातो मृतः शश्वदहं वियोनीर्-मयोषिता भक्तिपराङ्मुखेन ।**
**अवाङ्मुखं देव जरायुवीतं मामुद्धर त्रस्तमितो भजे त्वाम् ॥७८॥**
**एवं स्तुत्वा सूतिवायु-त्यक्तो विस्मृतलब्धधीः । रोरूयति जनुर्लब्ध्वा मोहितो माययेश ते ॥७९॥**
**अनभिप्रेतमापन्न आसनोत्थानचेष्टने । पराधीनतया भुङ्क्ते स व्यथां वक्तुमक्षमः ॥८०॥**

मासा क्रूरः, द्वाभ्यां शिरः, च त्रिभिः ग्रीवादि अङ्गानि, चतुर्भिः त्वक्, पञ्चभिः रोम+नखाः, अथ षड्भिः।७६। नासा, अक्षि आदि रन्ध्राणि, सप्तभिः चलनं, अष्टभिः धीः, नवभिः पूर्णः देही भूत्वा ईश्वरं जगौ।७७। अहं शश्वत् जातः, मृतः। मया भक्ति+पराक्+मुखेन वियोनीः उषिताः। (हे) देव, अवाक्+मुखं जरायु+वीतं त्रस्तं मां इतः उद्धर। त्वां भजे।७८। एवं स्तुत्वा सूति+वायु+त्यक्तः जनुः लब्ध्वा विस्मृत+लब्ध+धीः ते मायया मोहितः रोरूयति।७९। वक्तुं असमर्थः पर+अधीन+तया आसन+उत्थान+चेष्टने अन्+अभिप्रेतं आपन्नःसः व्यथां भुङ्क्ते।८०।

एका महिन्यात त्याला काठिण्य येते, दोन महिन्यांत मस्तक, तीन महिन्यांत गळा इत्यादि अवयव, चार महिन्यांनी त्वचा, पाच महिन्यांनी रोम आणि नखे, सहा महिन्यांत(७६) नाक, डोळे इत्यादि छिद्रे, सात महिन्यांत हालचाल, आठ महिन्यांत पूर्वसंस्कारांनी युक्त निश्चयात्मिका बुद्धी प्राप्त होऊन नऊ महिन्यांत तो सर्वांगपरिपूर्ण देह धारण करतो आणि ईश्वराची प्रार्थना करतो.७७. 'देवा, मी तुझ्या भक्तीकडे पाठ फिरवून किती वेळा तरी जन्मलो आणि किती तरी वेळा मरण पावलो. नाना नाना योनींत कष्ट भोगले. आता मी खाली तोंड करून ह्या जारांत गुंडाळलेला गर्भाशयात त्रासून गेलो आहे. इथून माझी सुटका कर. मी तुझी भक्ती करीन.'७८. अशी स्तुती करून तो प्रसूतीच्या वायूद्वारा गर्भाशयातून बाहेर ढकलला जातो. जन्म झाल्याबरोबर त्याला आधी मिळालेली बुद्धी विसरून जातो आणि तुझ्या मायेच्या भुलीने रडायला लागतो.७९.

**ततोऽपि क्रीडनासक्तो वयस्यैरज्ञभावगः । तारुण्ये विषयासक्तो मत्तो दुर्जनसङ्गतः ।।८१।।**
**देवमायां स्त्रियं प्रेक्ष्य तद्भावैरजितेन्द्रियः । भोगोत्सुकः खलोऽज्ञात-कार्याकार्यो दुरध्वगः ।।८२।।**
**वार्धक्ये स्वजनत्रस्तो रुग्णोऽस्वस्थो जराकृशः । श्वासकासकफाविष्टः सम्भवत्यजितेन्द्रियः ।।८३।।**
**शतायुरपि रात्र्यार्धं हृतं शिष्टमपीदृशम् । कथंकारं नृजन्मापि श्रेष्ठं भक्त्या विना त्वयि ।।८४।।**

ततः अपि अज्ञ+भाव+गः वयस्यैः क्रीडन+आसक्तः। तारुण्ये विषय+आसक्तः मत्तः दुर्जन+सङ्गतः।८१। अजित+इन्द्रियः देव+मायां स्त्रियं प्रेक्ष्य तत्+भावैः भोग+उत्सुकः खलः अज्ञात+कार्य+अकार्यः दुः+अध्वगः।८२। वार्धक्ये स्वजन+त्रस्तः रुग्णः अस्वस्थः, अजित+इन्द्रियः श्वास+कास+कफ+आविष्टः संभवति।८३। शतायुः अपि रात्र्या अर्धं हृतम्। शिष्टं अपि ईदृशम्। नृजन्म अपि त्वयि भक्त्या विना कथंकारं श्रेष्ठम्।८४।

त्या नवजात तान्ह्याला आपल्याला काय हवे नको ते बोलताही येत नाही. उठणे, बसणे, चालणे या सर्व गोष्टींत तो पराधीन असतो. त्याला हवे असते एक आणि मिळते भलतेच. अशा अवस्थेत होणाऱ्या व्यथा तो भोगीत असतो.८०. त्यानंतर बाल्यावस्थेत तो अजाणच असतो. सवंगड्यांबरोबर खेळण्यातच मग्न असतो. तारुण्यात विषयांची अनिवार ओढ, धनजनाची मस्ती, दुर्जनांची संगती,(८१) इंद्रियवशता यांमुळे ईश्वरी मायेचेच रूप असलेल्या स्त्रियांना पाहून भोगाच्या लालसेने पेटलेला असतो. अशा रीतीने त्याचा कार्य आणि अकार्य यांचा विवेकही नष्ट होतो आणि तो वाकड्या मार्गाला लागतो.८२. म्हातारपणी आपलेच म्हणवणारे त्याला त्रासून टाकतात. रोग आणि अस्वस्थता त्याचा जीव नकोसा करतात. इंद्रियांवर ताबा नसतोच. त्यामुळे दमा, खोकला, कफ यांचा प्रादुर्भाव होतो.८३. माणसाचे आयुष्य अगदी शंभर वर्षे धरले तरीही रात्री झोपण्यातच निम्मे निघून जाते. उरलेल्याचीही गती ही अशी होते. हा मनुष्यजन्म शास्त्रांनी आणि पुराणांनी नावाजलेला असला तरी देवा, तुझ्या भक्तीवाचून तो कसा श्रेष्ठत्वाला पोचेल?८४.

**तत्साफल्यं नवविध-त्वद्भक्त्यासक्तसङ्गतिः । त्वयि भक्तिः साधने द्वे त्वां याचे भक्तवत्सल ।।८५।।**
**भो जनात्रावतीर्णोऽयं सद्धर्मत्राणकारणः । परमात्मा परं ब्रह्म लीलाधाम्नैष नो नरः ।।८६।।**
**सेव्यताममृतत्वाय योगैर्वा श्रवणादिना । भजतोऽनुभजत्येष भगवान् भक्तिभावनः ।।८७।।**
**यथा तृणौघोऽग्निस्पर्शाद् भस्मसाज्जायते तथा । निःशेषाघं कृपांशेन निर्दग्धं मेऽमुना तथा ।।८८।।**
**भगवन् कति ते वाच्या वाङ्मनोऽविषया गुणाः । श्रुत्या नेतीति सिद्धेपि श्रद्धावद्योगिगोचर ।।८९।।**

(हे) भक्तवत्सल, तत्+साफल्यं नवविध+त्वत्+भक्ति+आसक्त+सङ्गतिः (च) त्वयि भक्तिः द्वे साधने त्वां याचे।८५। 'भो जनाः। अयं परं+आत्मा परं ब्रह्म, लीला+धाम्ना सत्+धर्म+त्राण+कारणः अत्र अवतीर्णः। एष नो नरः।८६। योगैः वा श्रवणादिना (भवद्भिः) सेव्यताम्। एष भक्तिभावनः भजतः अनुभजति।८७। यथा तृण+ओघः अग्नि+स्पर्शात् भस्मसात् जायते तथा अमुना कृपा+अंशेन मे निःशेष+अघं निर्दग्धम्'।८८। '(हे) भगवन्! (हे) श्रद्धावत्+योगि+गोचर, श्रुत्या 'न इति' इति सिद्धे अपि (ते रूपे) ते वाक्+मनः+ अविषयाः गुणाः कति वाच्या?'।८९।

भक्तांच्या जिवलगा, त्या नरजन्माचे सार्थक, तुझे श्रवण, कीर्तन, स्मरण, सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि तुला आत्मनिवेदन अशा नवविध भक्तीत रंगलेल्यांची संगती (१) आणि तुझी भक्ति (२) हीच दोन साधने आहेत. ती मला लाभोत हीच याचना तुझ्या चरणी करीत आहे.८५.

'लोक हो! ह्या श्रीगुरूंना सामान्य माणूस असे समजू नका. हा साक्षात् परमात्मा आहे. अतीव प्रेमास्पद असल्याने हाच परब्रह्महही आहे. हा साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी लीलादेह धारण करून आला आहे. (ह्या विशेषणांनी त्यांच्या अवताराचे प्रयोजन आकार घेण्याचे कारणही सांगितले आहे.)८६. म्हणून सर्वांना माझे सांगणे आहे की अष्टांगयोगाने, निष्काम कर्मयोगाने किंवा श्रवणादि भक्तीने याची उपासना करा. कारण हा भक्तिभावन आहे; भजन करणाऱ्यांवर अनुग्रह करणारा आहे. *भजन* याचा अर्थ *निरंतर स्मरण, अनुसंधान.* भ.पू. पा. शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र भाष्यात म्हटल्याप्रमाणे 'दूरदेशी गेलेल्या पतीचे ज्या उत्कंठेने पत्नी स्मरण करते,'

**इत्यादिना बहु स्तुत्वा पदोः प्रणिपपात सः । शिष्टं कुष्ठं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः ।।९०।।**
**तत्रैव स्थापयामास तं दत्त्वेष्टं वरं प्रभुः । सोऽप्यानीय वधूं स्थित्वा व्यरचद्विविधाः कथाः ।।९१।।**

इति आदिना सः पदोः प्रणिपपात। तदा शिष्टं कुष्ठं विशिष्ट+इष्ट+सुतष्टितः नष्टम्।९०। तं इष्टं वरं दत्वा प्रभुः तत्र एव स्थापयामास। सः अपि वधूं आनीय स्थित्वा विविधाः कथाः व्यरचत्।९१।

तीच उत्कंठा इथे अभिप्रेत आहे. भक्तिशास्त्रमय बुद्धीने ईश्वराशी तादात्म्य पावलेल्या अभिमानाने भक्तिविषयात दीर्घकाल स्थिरावणे ह्यालाच उपासना असे नाव आहे. ह्या तादात्म्यावस्थेतूनच आनंद प्रकटतो. 'समाधीने सर्व चित्ताचे मल धुवून टाकल्यावर आत्म्यांत प्रविष्ट झाल्याने जे सुख होते ते अंतःकरणातच भोगता येते, वाणीने वर्णन करण्याजोगे नाही' असे पंचदशीत (११:११८) म्हटले आहे ते याच अर्थाने (*समाधिर्निधूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत्। न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते।।*).८७. 'गवताची बनीम आगीच्या एका ठिणगीने जळून जावी तसे माझ्या पापाचे डोंगर ह्या श्रीगुरूंच्या कृपालेशाने निःशेष भस्मसात् केले आहेत.'८८. या श्लोकात श्रद्धावान् योग्यांच्याच दृष्टी पडणारा असे संबोधन हेतुगर्भ आहे. वेदांनी सुद्धा 'स्थूल नाही, अणु नाही', 'नाही नाही, असे नाही' असा निर्णय केलेले मन-वाणीला अगोचर असे तुझे गुण किती म्हणून गावेत?'८९ अशा प्रकारे नानाविध स्तोत्रांनी श्रीगुरूंचे स्तवन करून नन्दीने त्यांच्या चरणांवर दंडवत घातला. तेव्हा विशेष विद्वानांनाच इष्ट असणारा तो श्रीगुरुनाथ प्रसन्न झाला आणि त्या नंदीचे उरलेसुरले कोडही नाहीसे झाले. मनुस्मृतीत शिष्ट शब्दाची व्याख्या 'ज्यांनी वेद आणि वेदांगाचा धर्मानुसार अभ्यास केला ते ब्राह्मण' अशी केली आहे (*धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः। ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः।।* १२.१०९।।).९०.

त्याला हवा असलेला वर देऊन नृसिंहप्रभूंनी तिथे गाणगापुरांतच त्याना राहवून घेतले. नन्दीही आपल्या कुटुंबाला घेऊन तिथे स्थायिक झाला आणि श्रीगुरूंच्या स्तवनपर अशी काव्ये केली.९१.

**कवितां प्रसृतां लोके तस्य ज्ञात्वा नृकेसरी । कश्चित्कविरमंस्तेयं गर्ह्योदारापि नृस्तुतिः ।।९२।।**
**तद्ग्रामे केनचिन्नीतो गुरुस्तस्मै व्यदर्शयत् । उपास्यकल्लेशलिङ्गस्थं स्वं रूपं हृदर्चने ।।९३।।**
**पञ्चभिस्तं नवैः श्लोकैर् नित्यवन्मानसार्चने । स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह क्वास्ते कल्लेश्वरो वद ।।९४।।**
**तच्छ्रुत्वा स तदा ध्यानं विसृज्य भगवान्स्वयम् । नृरूपेणावतीर्णोऽयमिति मत्वान्वगाद्गुरुम् ।।९५।।**

तस्य कवितां लोके प्रसृताम्। ज्ञात्वा कश्चित् नृकेसरी कविः उदारा अपि अयं नृ+स्तुतिः गर्ह्या अमंस्त।९२। तत् ग्रामे केनचित् नीता गुरुः तस्मै उपास्य+कल्लेश+लिङ्ग+स्थं स्वं रूपं हृत्+अर्चने व्यदर्शयत्।९३। नित्यवत् मानस+अर्चने पञ्चभिः नवैः श्लोकैः स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह। 'ते कल्लेश्वर क्व आस्तेः? वद।'९४। तत् श्रुत्वा सः तदा ध्यानं विसृज्य 'अयं स्वयं भगवान् नृरूपेण अवतीर्णः,' इति मत्वा गुरुं अन्वगात्।९५।

त्याची कविता सर्व लोकात प्रसार पावली. नरकेसरी नावाच्या एका कवीच्या कानांवर त्या कविता पडल्या. 'कविता चांगल्या आहेत त्या मानवाच्या स्तुतीपर असल्याने निंद्यच आहेत,' असा विचार त्याच्या मनात आला.९२. एकदा कुणी भक्ताने श्रीगुरूंना नरकेसरीच्या गावी आणले असता तो आपल्या नित्यनेमानुसार कल्लेश्वराची पूजा करीत होता. त्या वेळी त्याला कल्लेश्वराच्या जागी श्रीगुरूच दिसू लागले.९३. रोजच्या नियमानुसार मानसपूजेत पाच नवीन रचलेल्या श्लोकांनी त्याने स्तुती केली. तेव्हा श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे, तुझा कल्लेश्वर कुठे आहे? सांग!'९४. ते ऐकून नरकेसरीने ध्यान विसर्जित केले आणि 'हे तर प्रत्यक्ष भगवंतच मानवरूपाने अवतरले आहेत,' असा निश्चय करून तो श्रीगुरूंकडे निघाला.९५.

**नृकेसरिर्गुरुं प्राप्य रचितैः पञ्चभिः शुभैः । श्लोकैस्तुष्टाव तं प्राह हित्वेशं स्तौषि किं नरम् ।।९६।।**

**।। नरकेसर्युवाच ।।**

**भवान्मयाज्ञभावेन मानुषो लौकिको मतः । कृपयापास्य मेऽज्ञानं सत्त्वं रूपं प्रदर्शितम् ।।९७।।**
**तेन नष्टोऽद्य मे मोहस्त्वत्प्रसादाज्जनार्दन । प्राक्पुण्यं फलितं मेऽदः शिष्यालौ मां नियोजय ।।९८।।**
**भगवानपि सुप्रीतस् तस्मै दत्वांशुकं वरम् । प्राह कल्लेश्वरं विप्र भज तत्रापि मत्स्थितिः ।।९९।।**
**स प्राह भगवन्तेऽदः प्रत्यक्षं रूपमुत्तमम् । हित्वोत्सहे न गन्तुं मां त्वत्पादाब्जे स्थिरीकुरु ।।१००।।**

नृकेसरिः गुरुं प्राप्य पञ्चभिः शुभैः रचितैः श्लोकैः तुष्टाव। तं प्राह 'ईशं हित्वा नरं स्तौषि किम्?'९६। नरकेसरि उवाच। 'मया अज्ञ+भावेन भवान् लौकिकः मानुषः मतः। कृपया मे अज्ञानं अपास्य सत्त्वं रूपं प्रदर्शितम्।९७। (हे) जनार्दन, तेन त्वत् प्रसादात् मे मोहः नष्टः। अदः मे प्राक् पुण्यं फलितम्। मां शिष्य+आलौ नियोजय।'९८। भगवान् अपि सुप्रीतः तस्मै वरं अंशुकं दत्वा प्राह, '(हे) विप्र, कल्लेश्वरं भज। तत्र अपि मत्+स्थितिः।'९९। सः प्राह। '(हे) भगवन्त, इदं प्रत्यक्षं उत्तमं रूपं हित्वा गन्तुं न उत्सहे। त्वत्+पाद+अब्जे स्थिरीकुरु'।१००।

नरकेसरीने श्रीगुरूंच्याकडे येऊन त्यांची आपण रचलेल्या पाच श्लोकांनी स्तुती केली. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे ईश्वराला सोडून मानवाची काय स्तुती करतोस?'९६. नरकेसरी उत्तरला, 'देवा, मी अज्ञानवश आपल्याला लौकिक माणूसच समजलो. आपणच कृपेने माझे अज्ञान निरसून सात्त्विक ज्ञानमय रूप दाखविले आहे.'९७. 'जनार्दना, त्या तुझ्या कृपाप्रसादाने माझा मोह नष्ट झाला आहे. हे माझे पूर्वपुण्यच फळाला आले आहे. मला आता आपण आपल्या शिष्यपंक्तीत मिळवून घ्यावे.'९८. भगवान् श्रीगुरूंनी प्रसन्न होऊन त्याला प्रीतीपूर्वक उत्तम वस्त्र दिले आणि म्हणाले, 'कल्लेश्वराचीच उपासना कर. त्यातही माझेच अस्तित्व आहे.'९९. नरकेसरी म्हणाला, 'आपले हे प्रत्यक्ष उत्कृष्ट रूप सोडून मला कुठेही जावेसे वाटत नाही. मला आपल्या पदकमलातच स्थिर करा!'१००.

**मद्धाम्न्याप्तोऽस्यनायासाद् भगवन् भक्तकामधुक् । दयाब्धे मा कुरूपेक्षां दयनीयतमस्य मे ।।१०१।।**
**इत्युक्त्वा स पपाताग्रे तमाश्वास्य दयानिधिः । शिष्यत्वेनोररीकृत्य स्वात्मसौख्यमुपादिशत् ।।१०२।।**
**एवं भूत्वा कवी द्वौ तौ संग्रथ्य हरिसत्कथाः । तत्कीर्तनाच्छ्रद्धयात्र कृतकृत्यौ बभूवतुः ।।१०३।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ।।**

**आदितः एकविंशोऽध्यायः ।। सप्ताहपारायणे षष्ठः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

'(हे) भक्त+काम+धुक् भगवन् अन+आयासात् मत्+धाम्नि आप्तः असि। (हे) दया+अब्धे, मे दयनीय+तमस्य उपेक्षां मा कुरु।'१०१। इति उक्त्वा सः अग्रे पपात। दयानिधिः तं आश्वास्य, शिष्यत्वेन उरीकृत्य स्व+आत्म+सौख्यं उपादिशत्।१०२। एवं तौ द्वौ कवी भूत्वा हरि+सत्+कथा संग्रथ्य श्रद्धया तत् कीर्तनात् कृतकृत्यौ बभूवतुः।१०३।

भगवंता, भक्ताची जणू कामधेनु असे आपण अनायासच माझ्या दारी आलेला आहात. दयासागरा, ह्या अतीव दयनीय अशा माझी उपेक्षा करू नका.१०१. असे बोलून त्या नरकेसरीने श्रीगुरूंच्या चरणी आपले शरीर झोकून दिले. तेव्हा श्रीगुरूंनी त्याला आश्वासन देऊन त्याचा शिष्य म्हणून स्वीकार केला आणि त्याला स्वात्मसौख्याचा उपदेश केला.१०२. असे हे दोन कवी होऊन गेले. श्रीगुरूंच्या पावन लीला त्यांनी ग्रथित केल्या आणि श्रद्धापूर्वक त्यांच्या कीर्तनाने ते कृतकृत्य झाले.१०३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा तिसरा आणि प्रथमपासून एकविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ॥ अथ द्वाविंशोऽध्यायः ॥

### ॥ नामधारक उवाच ॥

**श्रुतो गुणानुवादोऽपि हरेस्तृप्तिर्न मे गुरोः । अतीव वर्धते तृष्णा शश्वच्छ्रवणपानतः ॥१॥**
**भवाननलसो नूनमुदारतम एव मे । पूर्वश्रेयःप्रभावेन सङ्गतोऽस्ति कृपाकरः ॥२॥**

### ॥ सिद्ध उवाच ॥

**गुणानुवादक्षीराब्धेः कति पासि कथामृतम् । सच्चित्सुखस्य लीलानुरनन्तस्य परात्मनः ॥३॥**

नामधारक उवाच। हरेः गुरोः गुण+अनुवादः श्रुतः अपि मे तृप्तिः न। श्रवण+पानतः शश्वत् अतीव तृष्णा वर्धते।१। मे पूर्व+श्रेय+प्रभावेन भवान् अन्+अलसः उदार+तमः कृपा+करः सङ्गतः अस्ति।२। सिद्ध उवाच। सत्+चित्+सुखस्य नुः लीला+ अनन्तस्य परात्मनः गुण+अनुवाद+क्षीर+अब्धेः कथा+अमृतं कति पासि?३।

श्रीगणेशाय नमः। *बाविसीं आठ तनू धरुनि। आठहि गांवी दिवाळी करुनी। शूद्रशेती अमाप पिकवुनि। गाणगापुरची तीर्थे प्रकटविली॥१॥* नामधारक म्हणतात, 'आपल्या मुखातून इतका काळ पापतापहर श्रीगुरूंच्या गुणामृताचे कर्णाद्वारे सतत पान करूनही माझी तृप्ती कांही होतच नाही. उलट त्या अमृतपानाची तृष्णा वाढतच आहे.'१. 'आपल्यासारखा कृपाळू, दातार, निरलस वक्ता मला लाभला ही माझी पूर्वपुण्याईचा फळाला आली आहे!'२. सिद्ध म्हणतात, 'सच्चिदानंद, अनंत, परमात्म्याने मायामानुष रूपाने केलेल्या लीलांच्या गुणानुवादाच्या क्षीरसागरातले कितीसे कथारूपी अमृत तू पिऊ शकशील?' त्या कथामृताचे निःशेष पान तूच काय पण कुणीच करू शकणार नाही, असा त्यांचा अभिप्राय आहे. इथे सिद्धमुनींनी श्रीगुरूंचे परब्रह्मत्व निर्देशिले आहे.३.

**गुणान्कात्स्न्र्येन वक्तुं न क्षमः कोऽपीशितुस्त्वहम् । उच्चावचखगोड्डान-न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।४।।**
**स भीमामरजातीर-विहारी भक्तवत्सलः । भक्ताधीनत्वमाश्रित्य सदाभूत्तन्मतानुगः ।।५।।**
**निराकारो निरीहोऽपि शुद्धसत्त्वस्वरूप्यजः । बुद्ध्या सङ्गत्य लीलार्थं स्वयं विश्वात्मकोऽभवत् ।।६।।**
**सर्वत्र स्थितिमांस्त्वेष पश्येयुर्मुनयो हि माम् । इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः ।।७।।**

कः अपि गुणान् कार्त्स्न्येन वक्तुं न क्षमः। अहं तु उच्च+अवच+खग+उड्डान+न्यायेन यथामति वक्ष्ये।४। सः भीमा+अमरजा+तीर+विहारी भक्तवत्सलः भक्त+अधीनत्वं आश्रित्य सदा तत्+मत+अनुगः अभूत्।५। निः+आकारः निः+ईहः शुद्ध+सत्त्व+स्वरूपी अजः अपि स्वयं लीला+अर्थं बुद्ध्या सङ्गत्य विश्व+आत्मकः अभवत्।६। एष तु सर्वत्र स्थिति+मान्, 'मां मुनयः पश्येयुः' इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः।७।

त्याचप्रमाणे त्या भगवद्गुणांचे वर्णन पूर्णपणे करणे कुणालाही शक्य नाही. अनंत आकाशात आपापल्या शक्त्यनुसार कमी अधिक उंचीची झेप घेणाऱ्या पक्षांप्रमाणे मी यथामती सांगत आहे.'४. 'भीमा आणि अमरजा यांच्या तीरावर भक्तांच्या उद्धाराची लीला करणारा तो भक्तवत्सल श्रीगुरू भक्तांच्या अधीन होऊन नेहमी त्यांच्या मतानुसार वागत असे.'५. सद्गुरू भगवान् भक्तांच्या मर्जीने वागतात तर त्यांना साकार म्हणावे की निराकार? या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मसूत्रानुसार (३ः२ः११) असेच द्यावे लागेल की ते न तर साकार आहे न निराकार. तत्त्वतः अरूपच आहे. साकार वा निराकार रूपाची कल्पना उपासनेच्या संदर्भात केली जाते. असे हे अरूप, संकल्परहित, शुद्धसत्त्वस्वरूप, निर्विकार परब्रह्म लीलेसाठी म्हणून महत्तत्त्वाशी मिळून विश्वात्मक झाले.६. सनकादिक मुनींना दृग्गोचर होण्यासाठी त्यांनी ब्रह्मा, विष्णू, महेश ही तीन रूपे धारण केली आणि सत्य, वैकुंठ आणि कैलास या तीन लोकांत राहिले.७.

**तत्रापि भुवि मे भक्ता भूयांसो मन्मयास्त्वहम् । तेषामगोचरोऽस्म्यस्मात् स्थेयं तत्रेत्यमंस्त सः ॥८॥**
**ततोऽत्र भगवान् भूमौ लीलाधाम्ना युगे युगे । भजतोऽनुभजत्येष श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ॥९॥**
**किं वर्ण्यते भगवतो भक्तवात्सल्यमद्भुतम् । परिपूर्णोऽपि सन्तृप्तो भोक्तुं भ्रमति तद्गृहे ॥१०॥**
**अन्या अपि तु तल्लीलास् तादृश्यः सन्त्यनन्तशः । स्वकृते तु न ता विद्धि भक्तानुग्रहलक्षणाः ॥११॥**
**कलौ घोरेऽत्र नो भाग्यमुदितं हि युगे युगे । दुर्लभस्तपसापीशः स्मृत्यैव सुलभोऽत्र नुः ॥१२॥**

तत्र अपि 'भुवि मे मन्मया भक्ताः भूयांसः। अहं तु तेषां अगोचरः अस्मि। अस्मात् तत्र स्थेयं' इति सः अमंस्त।८। ततः भगवान् अत्र भूमौ युगे युगे लीला+धाम्ना (अवतीर्य) भजतः अनुभजति। एष प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।९। भगवतः अद्भुतं भक्तवात्सल्यं किं उ वर्ण्यते? परिपूर्णः संतृप्तः अपि तत् गृहे भोक्तुं भ्रमति।१०। तादृश्यः अन्या अपि तु तत्+लीलाः अनन्तशः सन्ति। ता न तु स्व+कृते, भक्त+अनुग्रह+लक्षणाः विद्धि।११। अत्र घोरे कलौ नः भाग्यं हि उदितम्। युगे युगे तपसा अपि दुर्लभः ईशः अत्र नुः स्मृत्या एव सुलभः।१२।

त्यातही 'भूलोकात माझे किती तरी मन्मय झालेले भक्त आहेत त्यांना मात्र माझे दर्शन होत नाही, तिथेही मला जायला पाहिजे' अशी करुणा त्यांच्या मनांत उपजली.८. तेवढ्यासाठी भगवंत ह्या भूलोकावर लीलादेह धारण करून युगांयुगांतून अवतरून आपल्या भक्तावर अनुग्रह करीत असतो. कारण याला श्रद्धा आणि भक्ती फार आवडतात.९. या भगवंताचे भक्तवात्सल्य किती म्हणून वानावे? हा स्वयं परिपूर्ण आहे आणि सदैव तृप्त आहे. तरीही त्या भक्तांच्या दारोदार भिक्षेच्या निमित्ताने हिंडत असतो!१०. 'अशाच त्या प्रभूच्या अगणित लीला आहेत. पण त्या सर्वही तो स्वतःसाठी नव्हे तर भक्तांवर अनुग्रह करण्याच्या हेतूनेच करतो हे ध्यानात ठेव.११. ह्या घोर कलियुगात आपले भाग्य खरेच उगवले आहे; इतर युगात तपादि सायासांनीसुद्धा दुर्लभ असलेला हा ईश्वर मानवांना केवळ स्मरणमात्रे सुलभ झाला आहे.'१२.

**स एष भगवांस्तत्र भक्ताधीनतयान्वहम् । निमन्त्रितो भक्तगेहे भिक्षान्नं बुभुजे प्रभुः ।।१३।।**
**दीपावल्युत्सवे सप्त प्रिया भक्ता जगद्गुरुम् । स्वे स्वे गृहे नेतुकामा भिन्नवासाः समाययुः ।।१४।।**
**भवन्तं नेतुकामोऽद्य दीपाल्यां पञ्चवासरम् । प्राप्तोऽस्म्यद्यैव गन्तव्यमित्येकैकोऽब्रवीद् गुरुम् ।।१५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यूयं सप्तैक एवाहमेककालीन उत्सवे । सप्तग्रामेष्वेकदैव कथं मे गमनं भवेत् ।।१६।।**
**एकत्रैकैकघस्रे वा गतिरेकैकसद्मनि । सम्भवेच्चेत्कृतं तद्वद् भवद्भिर्मे वरं द्विजाः ।।१७।।**
**भक्ताधीनोऽस्मि मां यो यो नयेद्यास्यामि तत्र च । तच्छ्रुत्वान्योन्यं कलहं चक्रुर्नेष्याम्यहं त्विति ।।१८।।**

सः एष भगवान् प्रभुः तत्र भक्त+अधीनतया अनु+अहं भक्त+गेहे निमन्त्रितःभिक्षा+अन्नं बुभुजे।१३। सप्त प्रियाः भिन्न+वासाः भक्ताः दीपावलि+उत्सवे स्वे स्वे गृहे नेतु+कामाः समाययुः।१४। एक+एकः गुरुं अब्रवीत्। 'अद्य भवन्तं दीपाल्यां पञ्चवासरं नेतु+कामः प्राप्तः अस्मि। अद्य एव गन्तव्यम्।'१५। श्रीगुरुः उवाच। 'यूयं सप्त, एक एव अहं, एक+कालीन उत्सवे सप्त+ग्रामेषु एकदा एव मे गमनं कथं भवेत्?१६। एकत्र, एक+एक+सद्मनि एक+एक+घस्रे वा गतिः सम्भवेत्। (हे) द्विजाः, भवद्भिः तत्+वत् कृतं चेत् मे वरम्।'१७। भक्त+अधीनः अस्मि। यः यः मां नयेत् तत्र च यास्यामि। तत् श्रुत्वा अन्यः अन्यं 'अहं तु नेष्यामि' इति कलहं चक्रुः।१८।

तोच हा भगवंत त्या गाणगापुरात भक्तपराधीन होऊन रोज ज्याचे आमंत्रण असेल त्या भक्ताच्या भिक्षेचे अन्न तो प्रभू जेवत असे.१३. एका दिवाळीच्या सणाला सात वेगवेगळ्या गावचे सात प्रिय भक्त जगद्गुरूंना आपापल्या घरी घेऊन जाण्याच्या इच्छेने आले.१४. प्रत्येक जण येऊन श्रीगुरूंना म्हणू लागला, 'महाराज, आज मी आपल्याला दिवाळीचे पाच दिवस आमच्या घरी नेण्यासाठी आलो आहे. आजच निघायला हवे!' श्रीगुरूंनी सर्वांना समजावले, 'हे पाहा, तुम्ही सात जण आहा आणि मी तर एकटाच आहे. एकाच वेळी दिवाळीसाठी सात गावी जाणे कसे शक्य आहे?१६. एक तर तुम्ही सगळे दिवाळी एकत्रच करा किंवा मी एकेका दिवशी एकेकाच्या घरी जाईन. अशी कांही योजना तुम्ही कराल तर मला बरे वाटेल.१७. 'मी केवळ भक्तपराधीन आहे. जो माझा भक्त जिथे कुठे मला घेऊन जाईल तिथे मी येईन.' श्रीगुरूंचे बोलणे ऐकून सगळे आपापसात 'श्रीगुरूंना मीच नेणार' 'नाही मीच नेणार' असे वादू लागले.१८.

**निःस्वो धनीति द्वैतान्मां मा पाहि ह्यसि भो समः । भूतमात्रेऽत एहीति प्रोक्त्वा ते पतिताः पुरः ।।१९।।**
**निवार्य तान्सर्वगृहानेष्यामीत्युदितेऽपि ते । कैर्विश्वस्तव्यमित्यूचुर्भ्रान्ताः श्रीगुरुमीश्वरम् ।।२०।।**
**भगवानपि तद्भावं ज्ञात्वैकैकं रहो द्विजम् । सस्मितास्यः समाहूय प्राहोदारगिरा मुदा ।।२१।।**
**न वाच्यं क्वापि तेऽद्यैव गृहमेष्ये चरेत्यथ । तेऽपि सप्तैवमन्योन्यमशंसंतो ययुर्गृहान् ।।२२।।**

'भो निः+स्वः धनी इति द्वैतात् मां मा पाहि। भूतमात्रे समः असि। अत एहि।' इति प्रोक्त्वा ते पुरः पतितः।१९। तान् सर्वान् निवार्य, 'सर्व+गृहान् एष्यामि,' इति उदिते अपि ते भ्रान्तः ईश्वरं गुरुं ऊचुः, 'कैः विश्स्तव्यम्?' इति।२०। भगवान् अपि तत्+भावं ज्ञात्वा एके+एकं द्विजं रहः स+स्मित+आस्यः समाहूय उदारगिरा मुदा प्राह।२१। 'अद्य एव ते गृहे एष्ये। क्व अपि न वाच्यम्! चर।' इति। एवं ते सप्त अपि अन्यः अन्यं अशंसन्तः गृहान् ययौ।२२।

शेवटी सगळेच श्रीगुरूंना आपापल्या परीने गळ घालू लागले. 'भगवन्, अमुक गरीब, अमुक श्रीमंत असा भेद करू नका. आपण सर्व जीवांसाठी सम आहात. माझ्या घरी या.' असे म्हणून सगळ्यांनी श्रीगुरूंच्या समोर दंडवत घातले.१९. मग शेवटी त्या सर्वांना कसेबसे शांत करून श्रीगुरू म्हणाले, 'असे भांडू नका. मी सर्वांच्याच घरी येणार आहे!' श्रीगुरूंनी असे आश्वासन देऊनही, 'सर्वांनाच येतो म्हणता, मग कुणी विश्वास ठेवावा?' असे म्हणून त्यांनी साक्षात् परमेश्वरस्वरूप श्रीगुरूंवरच अविश्वास दाखविला.२०. आपल्या भक्तांची अंतरे जाणणाऱ्या भगवंताने हसऱ्या चेहऱ्याने, एकेका ब्राह्मणाला एकांतात बोलावून गंभीरपणे सांगितले,(२१) 'आजच मी तुझ्या घरी येणार आहे. कुणालाही सांगू नकोस! गुपचुप घरी जा.' अशा रीतीने ते सातही भक्त एकमेकांशी न बोलता मुकाट्याने आपापल्या घरी निघून गेले.२२.

**तत्रत्यैः क्व भवान् याति नो हित्वेत्युदितेऽत्र तु । तिष्ठामीति प्रभुः प्रोक्त्वाष्टौ ग्रामानेकदाभ्यगात् ॥२३॥**
**स्थलेषूवास पञ्चाहमष्टस्वपि जगन्मयः । लौकिकैकस्वरूपेण ततोऽस्थात् सङ्गमे प्रभुः ॥२४॥**
**स्वाद्वन्नशाटीकन्त्राण-पादुकार्पणसेवनैः । सन्तोषितः स भगवान् भक्तैराप मुहुर्मठम् ॥२५॥**
**पुनः सर्वेऽपि ते प्राप्ताः कार्तिक्यां तु परस्परम् । ऊचुर्मे धाम्नि पञ्चाहं दीपाल्यां संस्थितो गुरुः ॥२६॥**
**तत्रत्या अपि तं प्राहुः पञ्चाहं क्वापि नो गतः । अत्रैव प्रभुरस्माभिर् दीपावल्युत्सवं व्यधात् ॥२७॥**

तत्रत्यैः, 'भवान् नः हित्वा क्व याति?' इति उदिते, '(अहं) तु अत्र तिष्ठामि' इति प्रभुः प्रोक्त्वा, अष्टौ ग्रामान् एकदा अभ्यगात्।२३। जगत्+मयः अष्टेसु अपि स्थलेषु पञ्च+अहं उवास। ततः लौकिक+एक+स्वरूपेण प्रभुः सङ्गमे अस्थात्।२४। स्वादु+अन्न+शाटी+कं+त्राण+पादुका+अर्पण+सेवनैः भक्तैः सन्तोषितः भगवान् मुहुः मठं आप।२५। पुनः ते सर्वे अपि कार्तिक्यां प्राप्ताः परस्परं ऊचुः, 'गुरुः दीपाल्यां पञ्च+अहं मे धाम्नि संस्थितः।'२६। तत्रत्या अपि तं प्राहुः, 'प्रभुः पञ्च+अहं क्व अपि नो गतः। अत्र एव अस्माभिः दीपावलि उत्सवं व्यधात्।'२७।

हा सर्व प्रकार पाहून गाणगापुरच्या भक्तांनी विचारले, 'देवा, आपण दिवाळीत आम्हाला सोडून कुठे जाता?' त्यांना श्रीगुरू म्हणाले, 'मी तर इथेच थांबणार आहे!' असे त्यांचे समाधान करून सद्गुरुनाथ एकाच वेळी आठ गावांना गेले.२३. विश्वात्मक श्रीगुरू आठ गावांत नुसतचे गेले नाहीत तर त्या सर्वच गावी पाच दिवसपर्यंत राहिले. शिवाय एका (मुख्य) लौकिक स्वरूपाने संगमावरही राहिले.२४. गावोगावच्या भक्तांनी त्यांना गोडधोड जेवणाने, छाटी, शिरस्त्राण, पादुका इत्यादि अर्पण करून आणि त्यांची भक्तिभावाने सेवा करून त्यांना प्रसन्न केले. श्रीगुरूही आपल्या त्या सर्व प्रेमळ भक्तांचे समाधान करून मठात परतले.२५. पुनः ते सगळे कार्तिकी पौर्णिमेला श्रीगुरूंच्या दर्शनाला आले असता एकमेकांना सांगू लागले, 'गुरुमहाराज दिवाळीचे पाचही दिवस आमच्याकडेच होते!'२६. त्यांचा परस्परांतला वाद ऐकून गाणगापूरचे लोक त्यांना म्हणाले, 'महाराज कुठेही गेले नाहीत. दिवाळी इथेच आमच्याबरोबरच साजरी केली!' २७.

**मृषा मृषेति चान्योन्यं तदा प्रलपतो विभुः । तान्प्राह तूष्णीं स्थेयं भोः सर्वत्राहं गतः खलु ।।२८।।**
**तदा ते चकिताः सर्वे तुष्टुवुर्नतकन्धराः । भगवंस्ते परं पारं महिम्नोऽजानतां हि नः ।।२९।।**
**कथं लौकिकवाचस्त्वं स्तोत्रपात्रो भविष्यसि । श्रुतवाचामपि ब्रह्मन् न गुहाशयसंस्थित ।।३०।।**

तदा 'मृषा, मृषा' इति च अन्यःअन्यं प्रलपतः तान् प्रभुः प्राह, 'भोः तूष्णीं स्थेयम्। अहं सर्वत्र गतः खलु!'२८। तदा ते सर्वे चकिताः नत+कंधराः तुष्टुवुः। 'भगवन् ते महिम्नः परं पारं नः अजानतां हि।'२९। 'लौकिक+वाचः त्वं कथं स्तोत्रपात्रः भविष्यसि? (हे) गुहाशय+संस्थित ब्रह्मन्, श्रुत+वाचां अपि (स्तोत्रपात्रः) न।'३०।

तेव्हा, एकमेकांना 'खोटे, खोटे' असा प्रलाप करणाऱ्या त्या भक्तांना श्रीगुरूंनी शांत व्हायला सांगितले आणि म्हणाले, 'मी खरोखर सर्वांच्याच घरी होतो!'२८. तेव्हा आश्चर्यचकित होऊन सर्वांनी माना तुकवून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'भगवंता, तुझ्या महिमेचा परपार आम्हाला कळणे शक्य नाही.'२९. आमच्या ह्या लौकिक वाचेने तर आम्ही स्तुती करू शकतच नाही, पण हे गहन अंतरात राहणाऱ्या कूटस्थ ब्रह्मा, वेदांच्या वाचेलाही ते शक्य नाही. ब्रह्माला तैत्तिरीय उपनिषदांत (२:१:१) खोल अंतरात निहित असे म्हटले आहे (*निहितो गुहायाम्*). गुहाशय म्हणजे बुद्धी. तिच्या ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या त्रिपुटीतून होणाऱ्या व्यवहारातच भ्रांतिद्वारा भोग व विवेकाने मोक्ष निगूढ आहेत. आत्मस्वरूपही (ब्रह्म) त्या बुद्धीच्या माध्यमांतूनच उपलब्ध होते. म्हणून **गुहाशयांत संस्थित** असे विशेषण इथे योजले आहे. कठोपनिषदातही (१:३:१२) 'हा आत्मा सर्व जीवमात्रांत गूढरूपाने वास करतो; पण तो केवळ सूक्ष्म दृष्टीच्या ऋषींनाच त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीने दिसतो' असे म्हटले आहे. केनोपनिषदातही 'जे वाचेने व्यक्त होत नाही, ज्याने वाचा अभिव्यक्त होते' असे ब्रह्माचे वर्णन केले आहे. त्यानेही वाणीने त्याचे स्तोत्र करता येत नाही याचीच पुष्टी होते.३०.

**विश्वव्यापक तेऽनन्त दिव्यं जन्म क्रियाप्यज । नान्यार्थं नोऽमृतत्वार्थमवतारप्रयोजनम् ।।३१।।**
**श्रूयते दृश्यतेऽदो यत् त्वन्मायेयं दुरत्यया । मा वृणोत्विति भो श्रीमन् देहि नो दक्षिणां वराम् ।।३२।।**
**इत्युक्त्वा प्रणतिं चक्रुस्तान्सन्तोष्य जगत्प्रभुः । सर्वान्प्रस्थापयामास स्वं स्वं धामापि ते ययुः ।।३३।।**
**एवं स भगवान्नूनं पूर्णः सच्चित्सुखात्मकः । भक्ताधीनतया चेष्टा दुर्विभाव्या व्यधादिह।।३४।।**

(हे) विश्व+व्यापक, (हे) अनन्त, (हे) अज, ते दिव्यं जन्म, क्रिया अपि न अन्य+अर्थम्। तव अवतार+प्रयोजनं नः अमृत+अर्थम्।३१। (हे) श्रीमन्, अदः यत् श्रूयते, दृश्यते इयं दुः+अत्यया त्वत्+माया नः न आवृणोतु इति वरां दक्षिणां देहि।३२। इति उक्त्वा प्रणतिं चक्रुः। जगत्+प्रभुः तान् सर्वान् संतोष्य प्रस्थापयामास। ते अपि स्वं स्वं धामं ययुः।३३। एवं सः पूर्णः सत्+चित्+सुख+आत्मकः भगवान् नूनं इह भक्त+अधीन+तया दुः+विभाव्या चेष्टा व्यधात्।३४।

'विश्वाला व्यापून राहिलेल्या, अनंत, निर्विकार सद्गुरो, तुझे अवतार आणि तुझ्या लीला अलौकिक आहेत. तुझ्या अवताराचे प्रयोजनहि अन्य कांहीही नसून आम्हा भक्तांचा मोक्ष हेच आहे.३१. श्रीमंता, हे जे कांही दिसणारे, ऐकले जाणारे इंद्रियगोचर जगत् आहे ती सर्व तुझी दुरत्यय माया आहे. तिच्या आवरणापासून आम्हांला मुक्त ठेव.' या प्रार्थनेत हे अभिप्रेत आहे की जीव हा परमात्म्याचाच अंश असल्याने त्याला वास्तव असा बंध नाही. मायेच्या आवरणाचा आभासिक बंधच आहे. 'ह्या जगाचा न निरोध आहे न उत्पत्ती आहे; इथे ना कुणी ना बद्ध आहे ना साधक; न कुणी मुमुक्षू आहे न कुणी मुक्त. अशी ही परमार्थता आहे,' या विद्यारण्यस्वामींच्या पंचदशीतील (*न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुर्न वा मुक्त इत्येषा परमार्थता।।* ६:२३५।।) वचनाचा हाच अभिप्राय आहे. म्हणून 'मायेच्या आवरणापासून आम्हाला मुक्त ठेव,' हीच श्रेष्ठ दक्षिणा त्या ब्राह्मणांनी मागितली आहे. दक्षिणा हा ब्राह्मणांचा अधिकारच आहे.३२. अशी प्रार्थना करून त्यांनी प्रभूंना प्रणिपात केले. जगन्नाथ सद्गुरूंनी त्या सर्वांचे समाधान करून त्यांना निरोप दिला. मग ते सर्व आपापल्या घरी गेले.३३. तो सच्चिदानंदस्वरूप भगवंत भक्तांना वश होऊन अशा मानवी बुद्धीला अगम्य अशा लीला करीत गाणगापुरांत राहिला होता.३४.

**जात्याचारवयोरूप-विद्यार्थगुणपौरुषम् । नापेक्षते हि भगवान् श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।३५।।**
**शृणु चित्रं प्रवक्ष्यामि कश्चिच्छूद्रो गुरुप्रियः । दास्येनैवैहिकान् भोगान् भुक्त्वान्ते मुक्तिभागभूत् ।।३६।।**
**कृषीवलः स तु सदा स्वकर्मासक्त एव तम् । स्वक्षेत्रादामठं यांतं ननाम प्रत्यहं गुरुम् ।।३७।।**
**तद्गमागमसौख्यार्थं प्रत्यहं सङ्गमायनम् । अपास्य कण्टकाश्मादीन् सुगमं विशदं व्यधात् ।।३८।।**

भगवान् जाति+आचार+वयः+रूप+विद्या+अर्थ+गुण+पौरुषं न हि अपेक्षते। प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।३५। 'चित्रं प्रवक्ष्यामि। शृणु। कश्चित् गुरु+प्रियः शूद्रः दास्येन एव ऐहिकान् भोगान् भुक्त्वा अन्ते मुक्ति+भाक् अभूत्।३६। सः कृषीवलः सदा स्व+कर्म+असक्तः एव। स्व+क्षेत्रात् आमठं यान्तं तं गुरुं प्रति+अहं ननाम।३७। प्रति+अहं तत्+गम+आगम+सौख्य+अर्थं सङ्गम+अयनं कण्टक+अश्मादीन् अपास्य सुगमं विशदं व्यधात्।३८।

त्या परमात्म्याला भक्ताकडून ब्राह्मणादि जाती; श्रौत वा स्मार्त आचार; बाल, युवा, वृद्ध आदि वय; सुंदर रूप; भौतिक वा आध्यात्मिक विद्या; संपदा; शांती, दया, क्षमा आदि गुण; प्राण, इंद्रिये वा शरीर यांचे बल या कशाचीही अपेक्षा नव्हती. त्यांना अपेक्षा होती तर ती केवळ दृढ श्रद्धा आणि गाढ भक्ती यांची! इथे श्रीगुरूंना **प्रभू** हे विशेषण लावण्यामागचा हेतू श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत सांगितला आहे. भक्तांचे ईप्सित पुरविताना त्यांच्या प्रभुत्वामुळे त्यांना कोणीही अडवू शकत नाही. इथे त्यांनी ऋग्वेदाचा संदर्भ दिला आहे (८:८१:३).३५.

'असाच एक चमत्कार घडलेला तुला सांगतो, ऐक. श्रीगुरूंचा आवडता एक शूद्र भक्त होता.३६. तो शेतकरी आपले शेतीचे काम अनासक्त वृत्तीने करायचा. रोज मठाकडून येणाऱ्या श्रीगुरूंना तो साष्टांग नमस्कार घालायचा.३७. श्रीगुरूंना चालताना टोचू वा लागू नयेत म्हणून तो संगमाच्या वाटेवरील काटे, खडे इत्यादि बाजूला सारून तो रस्ता मऊ आणि रुंद करायचा.'३८.

**नत्वा पूर्ववदायान्तं मुदा तद्गतमानसः । कृषिं चकार तं दासं पृच्छति स्मैकदा गुरुः ।।३९।।**
**सदा मेऽग्रे कुतः शूद्र पतस्येतेन किं वद । साध्यं किं तेऽस्ति मनसि तदद्योद्घाटयाखिलम् ।।४०।।**

**।। शूद्र उवाच ।।**

**भजामि सुखकामस्त्वां क्षेत्रं ते कृपयाखिलम् । मनोज्ञं भाति तत्प्रेक्ष नोपेक्ष्यः पादजोऽप्यहम्।।४१।।**
**तदा सस्मितमीशोऽपि सर्वं क्षेत्रं विलोक्य तत् । आप्रादुर्भूतसस्यं तं प्राह द्राक् छिन्ध्यदोऽखिलम् ।।४२।।**

आयान्तं मुदा तत्+गत+मानसः पूर्ववत् नत्वा कृषिं चकार। तं दासं एकदा गुरुः एकदा पृच्छति स्म।३९। '(हे) शूद्र, सदा मे अग्रे कुतः पतसि? एतेन ते किं साध्यम्? ते मनसि किं अस्ति? तत् अखिलं अद्य उद्घाटय।'४०। शूद्र उवाच। त्वां सुख+कामः भजामि। ते कृपया अखिलं क्षेत्रं मनोज्ञं भाति। तत् प्रेक्ष। पादजः अपि अहं न उपेक्ष्यः।४१। तदा ईशः अपि सस्मितं तत् सर्वं आ+प्रादुर्भूत+सस्यं क्षेत्रं विलोक्य तं प्राह, 'अदः अखिलं द्राक् छिन्धि।'४२।

परत संगमाकडून श्रीगुरू आले की पहिल्यासारखाच दंडवत घालायचा आणि आपल्या शेतीच्या कामाला लागायचा. त्या दासाला एकदा श्रीगुरूंनी विचारले,(३९) 'काय रे शूद्रा! रोज का माझ्यासमोर आडवा पडतोस? तुला यातून काय साधायचे आहे? तुझ्या मनात तरी काय आहे? आज सगळे कांही मला सांग पाहू.'४०.

तो शेतकरी म्हणाला, 'सुखाच्या इच्छेने मी आपली भक्ती करतो. आपल्या कृपेने ही माझी शेती चांगली दिसतेय, तिच्यावर आपली कृपादृष्टी एकवार पडू द्या! शूद्र म्हणून माझी उपेक्षा करू नका.'४१. त्याच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरू परमेश्वरांनी ते नुकत्याच अंकुरलेल्या पिकाने हिरवे दिसणारे सर्व रान पाहिले; आणि त्याला म्हणाले, 'हे सर्व लगेच कापून टाक!४२.

**विश्वासो मेऽस्ति वाक्ये चेच्छिन्धि मे यावदागमः । इत्युक्त्वा संगमं गत्वा प्रभुः कर्माह्निकं व्यधात् ।।४३।।**
**गत्वा शूद्रोऽपि पत्ये तु प्राह निश्चित्य ते करम् । क्षेत्रं देहीति स प्राह नेदं साध्वद्य कर्षक ।।४४।।**
**शश्वत्प्रार्थ्य परुद्दत्त-द्विगुणं भागमङ्घ्रिजः । दातुं निश्चित्य जग्राह प्रमापत्रमतोऽपि सः ।।४५।।**
**आहूयाथार्थलुब्धान्स लोकान्यावच्छिनत्ति तत् । सापत्या क्षेत्रमेत्य द्राग् वारयामास तं वधूः ।।४६।।**

मे वाक्ये विश्वासः अस्ति चेत् यावत् मे आगमः छिन्धि।' इति उक्त्वा प्रभुः सङ्गमं गत्वा आह्निकं कर्म व्यधात्।४३। शूद्रः अपि पत्ये गत्वा तु प्राह, 'ते करं निश्चित्य क्षेत्रं देहि' इति। स प्राह, '(हे) कर्षक, अद्य इदं न साधु।'४४। अङ्घ्रिजः शश्वत् प्रार्थ्य परुत्+दत्त+द्वि+गुणं दातुं निश्चित्य प्रमा+पत्रं जग्राह। अतः सः अपि (प्रमा+पत्रं जग्राह)।४५। अथ अर्थ+लुब्धान् आहूय लोकान् आहूय यावत् छिनत्ति तत् वधूः सापत्या द्राक् क्षेत्रं एत्य तं वारयामास।४६।

माझ्या वचनावर तुझा विश्वास असेल तर मी संगमावरून परत येईतोवर सगळे कापून टाक!' एवढे बोलून श्रीनरसिंह प्रभू संगमावर जाऊन आपल्या आह्निकात मग्न झाले.४३. इकडे तो शूद्र मालकाकडे गेला आणि म्हणाला, 'मालक, तुमचा कर पक्का करून मला शेत कापायला द्या.' मालकाने त्याला सांगितले की 'आज कांही ते शेत कापण्यायोग्य नाही.' त्यावर त्या शेतकऱ्याने वारंवार हात जोडून प्रार्थना केली आणि शेवटी गतवर्षीच्या दुप्पट कर देण्याचे मान्य करून त्याच्याकडून करारपत्र घेतले. त्या मालकानेही तसेच पत्र शेतकऱ्याकडून घेतले.४५.

मग त्या शूद्र भक्ताने द्रव्यलोभी कामकऱ्यांना बोलावून कापणीला सुरुवात केली. (कारण ही अकाळी कापणी करायला दुसरे कुणी आले नाहीत.) इतक्यात त्याच्या पत्नीला हे वृत्त समजून ती मुलाबाळांसह धावतपळत तिथे आली आणि त्याला अडवू लागली.४६.

**निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके । चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत् ।।४७।।**
**स नोन्मत्तस्तु भरत-प्रऱ्हादकबिभीषणैः । मातापित्रग्रजास्त्यक्ता गुर्वर्थे का कथान्यतः ।।४८।।**
**सा गत्वेशं रुदत्यूचे मुण्डिवाक्यानुवर्त्यहो । क्षेत्रं छिनत्ति तेऽपक्वं प्रमत्तस्तं निवारय ।।४९।।**
**निवारणाय सोऽप्येकं दूतं प्रेरयदेत्य सः । तस्मै गम्भीरया वाचा स्वामिवाक्यं शशंस ह ।।५०।।**

'निधाः तोत्राणि, मा छिन्धि.' इति वदन्त्याः सः कैशिके पत्+धूलिं चूर्ण+प्रतिनिधि+कृत्य पुनः आच्छिनत्।४७। सः न उन्मत्तः। भरत+प्रऱ्हादक+बिभीषणैः तु माता+पितृ+अग्रजाः त्यक्ताः। गुरु+अर्थे अन्यतः का कथा?४८। सा रुदति ईशं गत्वा ऊचे, 'अहो, मुण्डि+वाक्य+अनुवर्ती प्रमत्तः ते अपक्कं क्षेत्रं छिनत्ति। तं निवारय।'४९। सः अपि निवारणाय एकं दूतं प्रेरयत्। सः एत्य तस्मै गम्भीरया वाचा स्वामि+वाक्यं शशंस ह।५०।

'विळे-कोयते खाली ठेवा! कापू नका!' असा ओरडा करणाऱ्या बायकोच्या केशांत पायधुळीचेच जणू चूर्ण घालीत तिला त्याने पिटाळून लावले. पायधुळीचे चूर्ण केसांत घातले याचा अर्थ तिच्या अंगावर धावून गेल्यावर ती पळत सुटली आणि तिच्या पायांनी उडालेली धूळ तिच्या केसांत गेली असा दिसतो.४७. बायकोच्या अंगावर असे धाऊन जायला तो काय वेडा झाला होता का? असे वाटू नये यासाठी म्हटले आहे. तो वेडा नव्हता. भगवद्भक्तांची निष्ठा ही अशीच असते. भरताने माता, प्रह्लादाने पिता आणि बिभीषणाने ज्येष्ठ भ्राता यांचा गुरूंसाठी म्हणजेच ईश्वरासाठी - तोच सर्वांचा गुरू आहे - त्याग केला. पत्नी इत्यादि अन्य नात्यांची गोष्ट काय वेगळी आहे का?४८. ती शेतकऱ्याची पत्नी रडत रडत मालकाकडे गेली आणि म्हणाली, 'अहो आमच्या धन्याला वेड लागलंय! त्या संन्याशाच्या सांगण्यावरून तुमचे शेत पिकायच्या आधीच कापायला निघालेत. तुम्ही तरी त्यांना आवरा!'४९. त्या मालकानेही एक निरोप्या शेतावर पाठविला. त्याने येऊन शूद्राला मालकाचा निरोप गंभीर वाणीने सांगितला.५०.

**तं प्राह शूद्रोऽपि पत्ये शंसारब्धोद्यमस्य तु । पारं यास्ये नो बिभेमि तत्प्रमालिपिरस्त्यसौ ।।५१।।**
**दूतोऽप्यागत्य पत्ये तु तत्स्माचष्टेऽब्रवीत् स ताम् । शूद्र्यन्यथा कथं वाक्यं कार्यं सोऽप्यर्थधान्यवान् ।।५२।।**
**तच्छ्रुत्वा सा रुदत्याप क्षेत्रसीमां सुतान्विता । तच्छूद्रोऽप्यखिलं छित्वा गुर्वागममचिन्तयत् ।।५३।।**
**कृत्वाप्याह्निकमागच्छन्छान्तं सर्वमवेक्ष्य तम् । प्रणतं प्राह किमिदं कृतं साहजिकोक्तितः ।।५४।।**
**यदन्येन हृदापीदृक् कर्तुं शक्यं न भुव्यदः । कर्माद्य दुष्करं निन्द्यं त्वया कृतमतःपरम् ।।५५।।**

शूद्रः अपि तं प्राह। पत्ये शंस, 'आरब्ध+उद्यमस्य तु पारं यास्ये! (अहं) न बिभेमि। असौ तत्+प्रमा+लिपि अस्ति।'५१। दूतः अपि आगत्य पत्ये तत् आचष्टे स्म। सः ताम् अब्रवीत्। '(हे) शूद्री, वाक्यं अन्यथा कथं कार्यम्? सः अपि अर्थ+धान्य+वान्।'५२। तत् श्रुत्वा रुदती सा सुत+अन्विता क्षेत्र+सीमां आप। तत् शूद्रः अपि अखिलं छित्वा गुरु+आगमं अचिन्तयत्।५३। आह्निकं कृत्वा आगच्छन् सर्वं शान्तं अवेक्ष्य प्रणतं तं प्राह, 'साहजिक+उक्तितः इदं किं कृतम्?'५४। 'भुवि यत् अन्येन हृदा अपि ईदृक् कर्तुं न शक्यं, अदः दुष्करं निन्द्यं कर्म अद्य त्वया कृतम्। अतः परं..'५५।

शूद्रानेही त्याला जवाब दिला. 'सांग मालकाला, आता हे सुरू केलेले काम मी तडीला नेणारच. मी कांही त्याला भीत नाही, हा पहा, त्याचा परवाना माझ्याकडे आहे.'५१. त्या निरोप्यानेही मालकाला जाऊन त्याचा जवाब सांगितला. तो त्या शेतकरणीला म्हणाला, 'बाई काय करणार? एकदा लिहून दिलेले पत्र परत कसे घेणार? आणि मला ठाऊक आहे मला कर देण्यासाठी त्याच्याकडे धान्यही आहे आणि पैसाही आहे.'५२. मग ती शूद्रस्त्री रडत रडतच मुलांसह शेताच्या बंधाऱ्याला आली. तोपर्यंत त्या शेतकऱ्याने सगळे शेत कापून टाकले होते आणि तो श्रीगुरू संगमावरून येण्याची वाट पहात होता.५३. श्रीगुरू आपले आह्निक करून संगमावरून आले आणि त्यांनी सगळ्या शेताची कापणी झालेली आणि सर्व सामसूम पाहिली आणि दंडवत घालीत असलेल्या शेतकऱ्याला म्हणाले, 'अरे, मी सहज बोलून गेलो; तर हे तू काय केलेस?'५५.

**कुतस्ते भविता वृत्तिर्दास्यसीशाय किं वद । अपक्वं हरितं सर्वं सस्यमेतद्‍वृथा गतम् ।।५६।।**
**स प्राहोक्तं कथमपि श्रुतवत्सद्गुरोर्वचः । तन्मेऽपि फलदं जन्म दत्तं येन स वृत्तिदः ।।५७।।**
**भक्तिश्चेदुक्तवद्भूयात्त इत्युक्त्वा ययौ गुरुः । सोऽप्याप स्वगृहं धीरो ध्यायन्हरिपदाम्बुजम् ।।५८।।**
**कालेनाल्पीयसा सूर्य इते मूलर्क्षमम्बुदः । ववर्ष च्छिन्नमपि तद्यावनालाद्यवर्धत ।।५९।।**
**प्रादुर्भूतानसंभाव्यानङ्कुरानभितोऽमितान् । दृष्ट्वा जल्हादिरे सर्वे शूद्र्यप्यत्यन्तहर्षिता ।।६०।।**

‘(अतः परं) ते वृत्तिः कुतः भवति? ईशाय किं दास्यसि? वद। एतत् हरितं अपक्वं सस्यं सर्वं वृथा गतम्!’५६। सः प्राह, ‘कथं अपि उक्तं सद्गुरोः वचं श्रुतवत्। तत् मे अपि फलदम्। येन जन्म दत्तं स वृत्तिदः!’५७। ‘ते भक्तिः चेत् उक्त+वत् भूयात्।’ इति उक्त्वा गुरुः ययौ। सः अपि धीरः हरि+पद+अम्बुजं ध्यायन् स्वगृहं आप।५८। अल्पेन कालेन सूर्यः मूल+ऋक्षं इते अम्बुदः ववर्ष। तत् छिन्नं अपि यावनालादि अवर्धत।५९। अभितः अमितान् असंभाव्यान् अङ्कुरान् प्रादुर्भूतान् दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे। शूद्री अपि अत्यन्त हर्षिता।६०।

‘आतां तुझा निर्वाह कसा होईल? आणि मालकाला काय देणार? सांग बरे! छान उगवलेले हे हिरवे गार शेत सगळे नापीक वाया गेले!’५६. तो उत्तरला, ‘सहज वा थट्टेने कसेही सद्गुरूंचे वचन हे वेदवाक्यासारखे आहे. मला तेसुद्धा उत्तम फलदायक ठरेल! निर्वाहाचे म्हणाल तर जो जन्म देतो तोच अन्नही देतो.’ इथे श्रीस्वामिमहाराजांनी एक सुभाषित उद्धृत केले आहे. *यो मे गर्भगतस्यापि वृत्तीं कल्पितवान् विभुः। शेषवृत्तिविधानाय स वै सुप्तोऽथवा मृतः।।* ज्या भगवंताने गर्भात असतानाही माझ्या जीविकेची योजना केली तो उरलेल्या आयुष्याची सोय न करायला काय झोपलाय की मेलाय?५७. ‘तुझी जर अशी भक्ती असेल तर तू म्हणशील तसेच होईल!’ असे म्हणून श्रीगुरू मठाला गेले. तो धैर्यधर शूद्रही श्रीगुरूंच्या पदकमलांचे चिंतन करीत आपल्या घरी परतला.५८. कांही थोड्या काळाने सूर्य मूळ नक्षत्राला गेला असताना मेघ वर्षला. त्यायोगे छाटून टाकलेल्या त्या ज्वारी इत्यादि पीकांच्या धाटांना पुनः चारी बाजूनी अगणित असंभाव्य अंकुर फुटले. ते पाहून सर्वांना आनंद झाला. शूद्री तर हरखून गेली.६०.

**पत्युः पादौ सकारुण्यं गृहीत्वा गद्गदाक्षरा । बभाषे गुरुभक्तोऽसि मम मन्तून्क्षमस्व भोः ।।६१।।**
**तथेत्युक्त्वा तया शूद्रः प्रपूज्य क्षेत्रपं गुरुम् । यान्तं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतो वाक्यमब्रवीत् ।।६२।।**
**अङ्घ्री चिन्तामणिर्वाक्यं सुधास्पर्धि दयानिधे । ज्योतिर्मयो न वेत्त्यन्धो घूकोऽर्कमिव धाम ते ।।६३।।**
**दृष्टं समूढपुण्येन धाम ते दिव्यमद्भुतम् । कृतकृत्योऽस्म्यतो देव मां माधोक्षज विस्मर।।६४।।**

पत्युः पादौ स+कारुण्यं गृहीत्वा गद्गद+अक्षरा बभाषे, 'भोः गुरु+भक्तः असि। मम मन्तून् क्षमस्व।'६१। तथा इति उक्त्वा शूद्रः तया क्षेत्र+पं प्रपूज्य, यान्तं गुरुं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतः वाक्यं अब्रवीत्।६२। '(हे) दया+निधे, (ते) अङ्घ्री चिन्तामणिः, वाक्यं सुधा+स्पर्धि, धाम ज्योतिः+मयः घूकः अर्क इव अन्धः न वेत्ति।६३। (हे) देव, (मया अपि) समूढ+पुण्येन ते दिव्यं अद्भुतं धाम दृष्टम्। अतः कृतकृत्यः अस्मि। (हे) अधोक्षज, मां मा विस्मर।६४।

तिच्या डोळ्यांतून पाणी वाहू लागले. पतीचे पाय धरून भरलेल्या कंठाने ती म्हणाली, 'अहो, तुम्ही खरेच गुरुभक्त आहात. माझ्या अपराधांची क्षमा करा.'६१. 'बरं, बरं' असे तिला म्हणून तिच्याबरोबर शेताला जाऊन त्याने क्षेत्राचे रक्षण करणाऱ्या देवाची पूजा केली. इथे **क्षेत्रप** या शब्दावर श्लेष करून श्रीस्वामिमहाराजांनी क्षेत्रप म्हणजे *क्षेत्रज्ञ* अर्थात् आत्मा असा अर्थ करून त्याच्या अज्ञानाने अश्रद्धा, त्यामुळे पतिनिंदा, श्रीगुरूंचा धिक्कार अशी दुष्कर्मे तिच्याकडून झाली. पण आता त्या आत्म्याच्याच प्रसादाने लौकिक लाभ दिसल्याने त्या तमोगुणाविष्ट शूद्रस्त्रीला दुर्लभ शांती प्राप्त झाली ही त्या क्षेत्रज्ञाचीच कृपा नाही का? अशा त्या अंतःस्थ आत्मरूपाचा सत्कार केला. त्याच वेळी श्रीगुरु तिकडून जात होते. त्यांना ती पिकलेली शेती दाखवून त्या शेतकऱ्याने साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला,(६२) 'दयासागरा, तुझे पाय चिंतामणी आहेत, तुझे वचन अमृताहून गोड आहे आणि तुझे स्वरूप ज्योतिर्मय आहे; परंतु दिवाभीताला सूर्य दिसत नाही तसे तुझे स्वरूप अज्ञानी जीवांना दिसत नाही. ते आज मी पाहिले. मी कृतकृत्य झालो! अधोक्षजा तुला माझा विसर पडू देऊ नको.'६४.

**तमाह श्रीगुरुः शूद्र धन्योऽस्यवरवर्ण ते । परितुष्टोऽस्मि दास्येन नूनं सद्गतिभाग्भव ।।६५।।**
**दुराचारोऽपि यदि चेत् सेवते मामनन्यधीः । स तु साधुर्हि तस्मात्त्वं स्वाचारो भक्तिमान् मयि ।।६६।।**
**अतस्ते दत्तमेतत्तु निवसेत् त्वत्कुलेऽमले । अचला कमला दास्यं मदीयं चाप्यसंशयम् ।।६७।।**
**इत्युक्त्वागाद्गुरुः सोऽपि गत्वेशं प्राह निश्चितात् । अधिभागं प्रदास्ये ते यतो धान्यर्धिरद्भुता ।।६८।।**

श्रीगुरुः तं आह, '(हे) शूद्र, अवर+वर्ण धन्यः असि। ते दास्येन नूनं परितुष्टः अस्मि। सत्+गति+भाक् भव।'६५। 'दुः+आचारः अपि यदि मां अनन्य+धीः सेवते चेत् स तु साधुः। हि तस्मात् स्व+आचारः (सु+आचारः) मयि भक्ति+मान्।६६। अतः ते एतत् तु ते असंशयं दत्तं, अचला कमला, मदीयं दास्यं अपि।'६७। इति उक्त्वा गुरुः अगात्। सः ईशं गत्वा प्राह, 'यतः अदभुता धान्य+ऋद्धिः ते निश्चितात् अधि+भागं प्रदास्ये'।६८।

त्याला श्रीगुरू म्हणाले, 'शूद्रा, तूं वर्णाने जरी कनिष्ठ असलास तरी धन्य आहेस! तुझ्या दास्यभक्तीने मी खरोखर पूर्ण प्रसन्न झालो आहे! तुला सद्गती लाभेल.'६५. श्रीगुरूंच्या बोलण्यात गीतेच्या (९:३०) श्लोकाचाच अनुवाद दिसतो. 'अगदी दुराचरणी जर अनन्यभावाने मला भजत असेल तर साधूच मानावा! तू तर आपल्या स्वतःचा (जातीचा) आचार पाळणारा आहेस. (उत्तम आचार करणारा आहेस असाही अर्थ करता येतो.) शिवाय माझी भक्ती करणारा आहेस.६६. म्हणून तुला माझे हे निःसंशय देणे आहे, स्थिर लक्ष्मी (संपत्ती) आणि माझे दास्य!' स्थिर संपत्ती दिल्यावर कदाचित् त्याच्याकडून प्रमाद घडू शकतो. म्हणून त्याला सन्मार्गावर स्थिरावणारे आपले दास्यही त्याला दिले आहे. इथे त्याला आत्मज्ञानाचा उपदेश का केला नाही अशी शंका घेण्याचे कारण नाही. शूद्राला उपनयनाभावी वेदांचा अभ्यास करता येत नाही. कुणी म्हणेल की ब्रह्मसूत्रानुसार (*तदुपर्यपि बादरायणः संभवात्।* १:३:२६) उपनयन न करताही देवांना वैदिक ज्ञान होऊ शकते तर शूद्रांना का नाही? देवांच्या बाबतीत त्यांना पूर्वजन्मार्जित पुण्याईने स्वयंप्रतिभेनेच वेदांचे ज्ञान असते. वेदांचे अध्ययन करावेच लागत नाही.

**स प्राह नान्यथोक्तिर्मे प्रसादात्सद्गुरोस्त्वियम् । लब्धा धान्यर्धिरनयं न स्पृशाम्यर्पयोक्तवत् ।।६९।।**
**परिपक्वं तदा दृष्ट्वा सस्यं छित्वानयद् गृहम् । कामं शेषं जनेभ्योऽदादमितं धान्यमुत्तमम् ।।७०।।**

सः प्राह, 'मे उक्तिःअन्यथा न। इयं धान्य+ऋद्धिः तु सद्गुरोः प्रसादात् लब्धा। अनयं न स्पृशामि। उक्तवत् अर्पय।'६९। तदा सस्यं परिपक्वं दृष्ट्वा छित्वा कामं गृहं आनयत्। शेषं अमितं उत्तमं धान्यं जनेभ्यः अदात्।७०।

त्यामुळे उपनयनसंस्काराची आवश्यकता नाही. शूद्राला वेदांच्या श्रवणाचा वा उच्चारणाचा अधिकार नसल्याने ते अध्यात्मविद्येचे अधिकारी कसे होतील? छांदोग्य उपनिषदात (४:२:५) रैक्वाने जानश्रुतीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करताना त्याला 'शूद्र' म्हटले आहे ते रूढ अर्थाने नाही. आपल्या विद्याराहित्याने दुःखी होऊन (*शुचा*) गुरूकडे धावणारा (*दुद्राव*) तो शूद्र असा अर्थ आहे. जानश्रुति वस्तुतः क्षत्रियच होता. मग शूद्रांना मुक्ती कशी मिळेल? महाभारतात शांतिपर्वात (३२८:४९) सांगितल्याप्रमाणे त्यांना पुराणश्रवणाचा अधिकार आहे. त्या श्रवणादिकांपासून त्यांना ज्ञानाचा अधिकार प्राप्त होऊन जन्मांतरी मोक्षलाभ होईल. धर्मव्याध वगैरे हीनयातीतल्या ज्ञान्यांची उदाहरणे पुराणात आहेत. त्यांच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासामुळे त्या जातीतही ज्ञानोदय झाला आहे. म्हणून शेतकऱ्याला केलेले दास्यदान योग्यच आहे.६७. असे म्हणून श्रीगुरू पुढे गेले. तो शेतकरीही मालकाकडे जाऊन म्हणाला, 'शेतांत अद्भुतरीत्या अमाप धान्य पिकले आहे. मी तुम्हाला ठरल्याहून अधिक धान्य देतो.'६८. तो मालक म्हणाला, 'मी माझा शब्द फिरवणार नाही! ही धान्यसमृद्धी तुला गुरूंच्या प्रसादाने झाली आहे. अन्यायाच्या कमाईला मी शिवणार नाही. आपला जेवढा ठराव झाला होता, तेवढेच मला दे.'६९. मग ते पिकलेले धान्य त्याने यथेष्ट घरी आणूनही उरले. तेव्हा त्याने कितीतरी धान्य लोकांना वाटून टाकले.७०.

**बहवो लेभिरे धान्यं प्रकामं सोऽपि सद्गुरोः । कृपया परया भूत्वा श्रीमान्सेवेऽतिनीचवत् ।।७१।।**
**तत्रेदृश्यः प्रभोर्लीलाः कति वृत्तास्तु कृत्स्नशः । न ज्ञाताः कैरपि पुरं मन्ये धन्यतमं तु तत् ।।७२।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सत्तमाश्रितकाश्यादि-क्षेत्रेषु भुवि सत्स्वपि । प्रीत्योवास कुतस्तत्र भगवान् मे वदस्व तत् ।।७३।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**तत्र तीर्थान्यनेकानि देवा अप्यखिलाः खलु । जगन्निवास उद्वीक्ष्य तस्थौ ध्रुवमधोक्षजः ।।७४।।**

बहवः प्रकामं धान्यं लेभिरे। सः अपि सद्गुरोः परया कृपया श्रीमान् भूत्वा अति+नीच+वत् सेवे।७१। तत्र ईदृशाः प्रभोः लीलाः वृत्ताः। कृत्स्नशः कैः अपि न ज्ञाताः। तत् पुरं तु धन्यतमं मन्ये।७२। नामधारक उवाच। 'भुवि सत्+तम+आश्रित+काशी+आदि+क्षेत्रेषु भुवि सत्सु भगवान् कुतः तत्र प्रीत्या उवास? तत् मे वदस्व।'७३। सिद्ध उवाच। 'जगत्+निवास तत्र अनेकानि तीर्थानि, अखिलाः देवाः अपि उद्वीक्ष्य अधोक्षजः ध्रुवं तस्थौ।'७४।

'खूप लोक हवे तेवढे धान्य घेऊन गेले. तो शूद्रही सद्गुरूंच्या कृपेने धनवान झाला. तरीही त्याला आढ्यतेचा स्पर्शही झाला नाही. तो अत्यंत दीनपणे सद्गुरूंची सेवा करीत राहिला.७१. अशा ह्या प्रभूंच्या किती तरी लीला त्या गाणगापुरात झाल्या. त्या सगळ्याच कुणालाही ठाऊक नाही. खरोखर ते गाव धन्यतम आहे.' ७२. नामधारकाने प्रश्न केला. 'मोठमोठ्या संतांनी सेविलेली काशी आदि अनेक क्षेत्रे ह्या भूमीवर आहेत. मग भगवंतांनी अत्यंत प्रीतीपूर्वक गाणगापूरलाच का वास्तव्य केले? कृपया मला सांगा.'७३. सिद्ध उत्तरले, 'त्यांचा निवास सर्व जगांत असला तरी भगवान अधोक्षज तिथे अनेक तीर्थे आणि सर्व देवांचे वास्तव्य पाहूनच राहिले आहेत.'७४.

**मन्दधीभिस्तु तीर्थानि तिष्येऽज्ञातानि तान्यतः । गुरुः प्राहैकदा लोकं पावनानि प्रदर्शयन् ।।७५।।**
**काशीं जिगमिषो लोक सर्वतीर्थानि चात्र तु । दर्शयामीति तान्प्रोक्त्वा तीर्थान्याह स दर्शयन् ।।७६।।**
**संगमोऽयं प्रयागोऽष्टौ तीर्थान्यत्र तु षट्कुले । त्रिवेणीसङ्गमोऽयं तु पापघ्न्यमरजेष्टदा ।।७७।।**
**जीवनायेशदत्तेन्द्र-नीयमानसुधाघटात् । युद्धे जालन्धरहत-देवानाममृतं च्युतम् ।।७८।।**
**किञ्चिच्च्युतादपि महा-प्रवाहोऽत्रामरत्वदः । कालमृत्युभयाघघ्नी जातैषामरजा ततः ।।७९।।**
**मनोरथाख्यं तीर्थं तु कल्पद्रवश्वत्थसन्निधौ । सन्तोषतीर्थमग्रेऽत्र रुद्रो विश्वेश्वरः स्वयम् ।।८०।।**

तिष्ये मन्द+धीभिः तीर्थानि अज्ञातानि। तानि पावनानि प्रदर्शयन् गुरुः एकदा लोकं प्राह,।७५। '(हे) काशीं जिगमिषः लोकः, सर्व+तीर्थानि तु अत्र दर्शयामि' इति तान् प्रोक्त्वा तीर्थानि दर्शयन् सः आह।७६। अय सङ्गमः प्रयागः। अत्र तु षट्कूले अष्टौ तीर्थानि। अयं तु त्रिवेणी+सङ्गमः। अमरजा पाप+घ्नी, इष्ट+दा (च)।७७। युद्धे जालंधर+हत देवानां जीवनाय ईश+दत्त+इन्द्र+नीयमान+सुधा+घटात् अमृतं च्युतम्।७८। किञ्चित् च्युतात् अपि अत्र अमरत्व+दः महाप्रवाहः। ततः एषा काल+मृत्यु+भय+अघ+घ्नी अमरजा जाता।७९। कल्पद्रु+अश्वत्थ+सन्निधौ तु मनोरथ+आख्यं तीर्थम्। अग्रे सन्तोष+तीर्थं अत्र रुद्रः स्वयं विश्वेश्वरः।८०।

कलियुगातील मंदबुद्धीच्या जीवांना मात्र ही तीर्थे अज्ञात असल्याने ती पावन तीर्थे प्रकट करण्यासाठी श्रीगुरू एकदा लोकांना म्हणाले,(७५) 'काशीयात्रेला जाऊ इच्छिणाऱ्या लोक हो, सर्वच तीर्थे मी तुम्हाला इथेच, गाणगापुरातच दाखवतो,' असे म्हणून ते सांगू लागले.७६. हा भीमा आणि अमरजा यांचा संगमच प्रयाग आहे. इथे षट्कूलात आठ तीर्थे आहेत. हा त्रिवेणीसंगमच आहे. ही अमरजा वांछित देणारी आणि पाप नासणारी आहे.७७. देव आणि दैत्यांच्या युद्धांत जालंधर नांवाच्या दैत्याकडून देवांचा मोठा संहार होऊ लागला. त्यावेळी त्यांना जिवंत करण्यासाठी भगवान शिवांनी दिलेला अमृताचा घडा इंद्र घेऊन जात असाताना त्यातील किंचित्से अमृत भूमीवर पडले.७८. त्या अमृतापासून हा अमरत्व देणारा महाप्रवाह निघाला. त्यापासूनच ही कालमृत्यू, भय आणि पाप यांना वारणारी अमरजा उगम पावली.७९. पुढे कल्पवृक्षसमान ह्या अश्वत्थाजवळ मनोरथ तीर्थ आहे. इथला हा रुद्र साक्षात् विश्वेश्वरच जाणा.८०.

**वामहस्तेन नन्द्यण्डं धृत्वाङ्गुष्ठं च तर्जनीम् । संस्थाप्य शृङ्ग्योर्मध्यात् कृतशैवीप्रदक्षिणः ।।८१।।**
**पश्येद्यदीशं मर्त्योऽपि देववच्छ्रीष्टयुग्भवेत् । साक्षात्काशीयमीशेन विहिता भक्ततुष्टये ।।८२।।**
**जीवन्मुक्तोऽत्र शैवः प्राग्लोके जड इतीरितः । येनाहिवज्जनो भोगा विषं स्त्रीः शववन्मताः ।।८३।।**

कृत+शैवी+प्रदक्षिणः वाम+हस्तेन नन्दी+अण्डं धृत्वा शृङ्ग्योः मध्यात् अङ्गुष्ठं च तर्जनीं संस्थाप्य,।८१। मर्त्यः अपि यदि ईशं पश्येत् देववत् श्री+इष्ट+युक् भवेत्। ईशेन भक्त+तुष्टये विहिता इयं साक्षात् काशी।८२। प्राक् अत्र जीवन्+मुक्तः शैवः लोके जड इति ईरितः। येन जनः अहि+वत्, भोगाः विषं, स्त्रीः शव+वत् मताः।८३।

या शंकराला शैवा प्रदक्षिणा करून, डाव्या हाताने नंदीचे वृषण धरून व शिंगांवर अंगठा आणि तर्जनी ठेवून(८१) शंकराचे जो दर्शन घेईल तो मर्त्य मानवसुद्धा देवासारखा धन आणि स्त्री, अन्न, पान इत्यादि इष्ट भोगांनी युक्त होतो. ही भगवान शंकरांनी भक्ताच्या तोषासाठी स्थापन केलेली साक्षात् काशीच आहे.८२. पूर्वी इथे एक शंकराचा जीवन्मुक्त, सदैव निरतिशय आनंदांत निमग्न झालेला भक्त रहात होता. लोक त्याला वेडा म्हणत. त्याने लोक सापासारखे मानून त्यांचा संग टाकला होता. कारण लोकरूपी सापाच्या दंशाने दुर्वासनांचे विष मनात भिनून विषयबाधा होते आणि कामादिवेदनांनी कष्टत तो साधू, प्रमाद नावाच्या मृत्यूला बळी पडतो. भोगांना तो विषच मानी. भोग काय किंवा विष काय शरीरात भिनून मृत्यूला कारण होतात. विषयतादात्म्याने प्रमाद - स्वरूपाचे विस्मरण होणे हे मरणच आहे. स्त्री त्याला प्रेतासारखी वाटते. दिवसा गिधाडे जशी प्रेतावर उड्या टाकून त्याचे लचके तोडतात आणि लांडगे-कोल्हे एकांतात रमतात, तसेच ह्या स्त्रीरूप प्रेताशी विषयासक्त लोकांचे वर्तन असते. म्हणून स्त्री दृष्टीला पडली तरी स्नान करावे असे त्या शिवभक्ताचे मत होते.८३.

**कदाचित्स सदा युक्तः प्रमाथीन्द्रियसंयमी । बन्धूनाहात्र काशीयं त ऊचुर्दर्शयाद्य नः ॥८४॥**
**स दध्यावीशमीशोऽपि तदैत्याहेप्सितं वद । स प्राहाद्य त्वया सार्धं काशीं संस्थापय ध्रुवाम् ॥८५॥**
**तथेत्युक्त्वेश्वरोऽगात्तज् जलान्तः कुण्डमुत्तमम् । उद्भूतं तत्र विश्वेश-मूर्तिराविरभूत्क्षणात् ॥८६॥**
**काश्यां चिह्नानि यान्यत्र जातान्यालोक्य तानि सः । स्वजनान्दर्शयित्वोचे काशीयं क्वापि यात नो ॥८७॥**

सदा युक्तः प्रमाथी+इन्द्रिय+संयमी सः कदाचित् बन्धून् आह, 'अत्र इयं काशी।' ते ऊचुः, 'अद्य नः दर्शय!'८४। सः ईशं दध्यौ। ईशः तदा एत्य आह, 'ईप्सितं वद।' सः प्राह, 'अद्य त्वया सार्धं ध्रुवां काशीं संस्थापय।'८५। ईश्वरः 'तथा' उक्त्वा अगात्। तत् जल+अन्तः उत्तमं कुण्डं उद्भूतम्। तत्र क्षणात् विश्वेश+मूर्तिः आविरभूत्।८६। यानि काश्यां चिह्नानि तानि अत्र जातानि आलोक्य सः स्व+जनान् दर्शयित्वा ऊचे, 'इयं काशी। क्व अपि नो यात।'८७।

निरंतर आत्मस्वरूपाशी युक्त असलेला आणि बलिष्ठ इंद्रियांवरही ताबा असलेला तो पिसा एकदा आपल्या बांधवांना म्हणाला, 'इथे ही काशीच आहे!' ते म्हणाले, 'तर मग आज आम्हाला दाखव पाहू!'८४. शिवप्रभूंचे स्मरण केले. लगेच प्रकट होऊन ते म्हणाले, 'तुला काय हवे ते सांग.' तो म्हणाला, 'आज या ठिकाणी चिरंतन काशीची स्थापना करा.'८५.

शंकर परमात्मा 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. त्याच वेळी पाण्यातून एक उत्तम कुंड उद्भवले आणि तिथे क्षणांत विश्वेश्वराची मूर्ती प्रकट झाली.८६. काशीत जी जी चिह्ने आहेत ती सर्व इथे दिसू लागली. ती पाहून त्या शिवभक्ताने आपल्या बंधूंना दाखविली आणि म्हणाला, 'ही काशी! आता तुम्हाला कुठेही जायला नको.'८७.

**प्रत्यब्दं पूजयित्वा नो विठ्ठलं कुलदैवतम् । काशीयात्रात्र कर्तव्या सर्वाघघ्नीप्सितार्थदा ।।८८।।**
**तस्मात्काशीयमित्यस्मिन् गुरौ ब्रुवति तत्क्षणम् । पूर्वाश्रमस्वसा रत्ना-नाम्नी प्राप्य ननाम तम् ।।८९।।**
**तामाह श्रीगुरुः प्रोक्त-स्मृतिस्तेऽस्ति न वा वद । सापि स्मृत्वा तदा स्वाङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह ।।९०।।**
**तां खिन्नां प्रणतां प्राह प्रभुः पापं भवान्तरे । चेद्भोक्ष्यसेऽत्र कुष्ठं द्रागपैत्यंहः प्रयत्नतः ।।९१।।**
**सा प्राह मातृकुक्षौ मे यथेतो न भवेत्स्थितिः । तथैव भवता कार्यं नान्यज्जाने परात्पर ।।९२।।**

'प्रति अब्दं कुल+दैवतं विठ्ठलं पूजयित्वा अत्र सर्व+अघ+घ्नी इप्सित+अर्थ+दा काशी+यात्रा कर्तव्या।'८८। 'तस्मात् इयं काशी' इति अस्मिन् गुरौ ब्रुवति तत्+क्षणम् पूर्व+आश्रम+स्वसा रत्ना+नाम्नी प्राप्य तं ननाम।८९। श्रीगुरुः तां आह। 'ते प्रोक्त+स्मृतिः अस्ति वा न? वद।' सा अपि स्मृत्वा तदा स्व+अङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह।९०। तां खिन्नां प्रणतां प्रभुः प्राह, 'पापं भव+अन्तरे भोक्ष्यसे चेत् कुष्ठं द्राक् अपैति, अंहः प्रयत्नतः (अपैति)।'९१। सा प्राह, 'यथा इतः मे मातृ+कुक्षौ स्थितिः न भवेत् तथा एव भवता कार्यम्। (हे) परात्पर अन्यत् न जाने।'९२।

'दर वर्षी आपल्या कुलदैवताची - विठ्ठलाची पूजा करून पापहारी आणि ईप्सितदायी काशीयात्रा इथे विधिवत् करावी.'८८. 'तेव्हापासून ही काशी झाली,' असे श्रीगुरू बोलतात न बोलतात तोच त्याच क्षणी त्यांची पूर्वाश्रमातील भगिनी रत्नाबाई तिथे आली आणि तिने श्रीगुरूंना नमस्कार केला.८९. श्रीगुरूंनी तिला विचारले, 'मी काय सांगितले ते आठवते ना?' तिला श्रीगुरूंनी, 'तुझा पती संन्यास घेईल आणि शरीरावर कुष्ठ पसरेल' असे सांगितले ते आठवले आणि लगेच तिला आपल्या सर्वांगावर कोड फुटलेले दिसले.९०. तेव्हा रत्नाबाईंनी दुःखित होऊन त्यांना नमस्कार केला. श्रीगुरू तिला म्हणाले, 'हे पाप जर तू पुढच्या जन्मी भोगायला तयार असशील तर कुष्ठ लगेच दूर होऊ शकेल. पापाचा परिहार होण्यासाठी प्रयत्न करावा लागेल.'९१. ती म्हणाली, 'परात्पर सद्गुरो, यापुढे मला पुनः आईच्या गर्भात राहण्याची वेळ येऊ नये असेच आपण करा. मी याउपर कांही जाणत नाही!'९२.

**गुरुः प्राहाघहृत्तीर्थे त्र्यहं स्नानाच्छिवान्तिके । सप्तजन्मार्जितांहोऽपि नश्येत्कुष्ठस्य का कथा ।।९३।।**
**सापि तत्र त्र्यहस्नानाद् भूत्वा कुष्ठोनितामला । मठं निर्माय तत्रैव स्थिता मुक्ता बभूव ह ।।९४।।**
**गुरुस्त्वग्रेऽघहृज्जम्बु-द्वीपस्थाखिलतीर्थवत् । कोटितीर्थं दर्शयित्वा प्राहेदं सफलाघहृत् ।।९५।।**
**क्रान्तिपर्वग्रहेष्वत्र स्नानदानजपादयः । अक्षय्यानन्तफलदा अकुत्सितहृदां नृणाम् ।।९६।।**
**गयावद्रुद्रपादाख्यं तीर्थं त्वग्रे गयोक्तवत् । कृध्वं कर्मात्र कृष्णाग्रे चक्राख्यं द्वार्वतीसमम् ।।९७।।**

गुरुः प्राह, 'शिव+अन्तिके अघ+हृत् तीर्थे त्रि+अहं स्नानात् सप्त+जन्म+अर्जित+अंहः अपि नश्येत्। कुष्ठस्य का कथा?'९३। सा अपि तत्र त्रि+अह+स्नानात् अमला कुष्ठ+ऊनिता भूत्वा मठं निर्माय तत्र एव स्थिता मुक्ता बभूव ह।९४। गुरुः तु अग्रे जम्बु+द्वीप+स्थ+अखिल+तीर्थ+वत् अघ+हृत् कोटि+तीर्थं दर्शयित्वा प्राह, 'इदं सकल+अघ+हृत्।'९५। अत्र क्रान्ति+पर्व+ग्रहेषु स्नान+दान+जप+आदयः अकुत्सित+हृदा नृणां अक्षय्य+अनन्त+फलदाः।९६। अग्रे तु गयावत रुद्र+पाद+आख्यं तीर्थम्। अत्र कर्म कृध्वम्। (तथा) अत्र कृष्ण+अग्रे चक्र+आख्यं द्वार्वतीसमं (तीर्थम्)।९७।

गुरू त्यावर म्हणाले, 'इथे शिवमंदिराजवळ पापनाशी तीर्थ आहे. त्यात तीन दिवस स्नान केल्यावर सात जन्मांचेही पाप नष्ट होते. मग कुष्ठाची काय कथा?'९३. रत्नाबाईने त्याप्रमाणे पापनाशन तीर्थात तीन दिवस स्नान केले. श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे तिचे कुष्ठ पूर्ण मावळले आणि ती शुद्ध झाली. पुढे तिने तिथेच एक मठी बांधली आणि तिथेच राहून अंती मुक्त झाली.९४. श्रीगुरू तिथून पुढे निघाले आणि सर्व लोकांना जम्बुद्वीपातील (भूलोकातील सात द्वीपांतील प्रमुख जम्बुद्वीप आहे. त्यातील मध्यवर्ती भारतवर्ष आणि त्याच्या मधोमध गाणगापूर आहे.) सर्व तीर्थांसमान पापहारी असे कोटितीर्थ दाखविले आणि म्हणाले, 'हे सर्व पापांचा नाश करणारे तीर्थ आहे.'९५. इथे मेषादि संक्रांतीला, पौर्णिमा-अमावस्या-व्यतिपातादि पर्वणींना आणि सूर्य-चंद्रग्रहणात स्नान, दान, जप इत्यादि केल्यास निष्कपट आणि श्रद्धावान भक्तांना अक्षय आणि अनंत फळ मिळते.९६. याच्या पुढे रुद्रपाद नावाचे गयेसारखेच तीर्थ आहे. इथे गयेला जसे सांगितले आहे तसे कर्म करावे. पुढे श्रीकृष्णासमोर चक्र नावाचे तीर्थ आहे. ते द्वारकेसारखे आहे.९७.

**द्वारकोक्तवदाचीर्णात् फलं तस्याश्चतुर्गुणम् । स्नानाज्ज्ञानी भवत्यत्र पतितोऽप्यस्थिचक्रवत् ।।९८।।**
**गोकर्णवद्ग्रामपूर्व-भागः कल्लेश्वरोऽत्र तु । महाबलेशवत्तीर्थं मन्मथाख्यं सुसिद्धिदम् ।।९९।।**
**नभस्यखण्डाभिषेकादूर्जे दीपोत्सवात्स तु । अक्षय्यफलदो दद्यात् सर्वसिद्धियुतामृतम् ।।१००।।**
**एवं शशंसाखिलतीर्थयात्रां । तेऽपि प्रहृष्टाश्च तथैव चेरुः ।**
**एतादृशं क्षेत्रमिदं वरीयो विज्ञाय विज्ञानमयात्मकोऽस्थात् ।।१०१।।**

(अत्र) द्वारका+उक्त+वत्+आचीर्णात् तस्याः चतुः+गुणं फलम्। अत्र स्नानात् पतितः अपि ज्ञानी भवति। अस्थि चक्रवत् च (भवति)।९८। ग्राम+पूर्व+भागः कल्लेश्वरः। अत्र तु महाबलेशवत् मन्मथ+आख्यं सुसिद्धि+दं तीर्थम्।९९। नभसि अखण्ड+अभिषेकात्, ऊर्जे दीप+उत्सवात् तु अक्षय्य+फलदः सर्व+सिद्धि+युत+अमृतं दद्यात्।१००। एवं अखिल+तीर्थ+यात्रां शशंस। ते अपि प्रहृष्टाः तथा एव चेरुः। इदं एतादृशं क्षेत्रं वरीयः विज्ञाय विज्ञान+मय+आत्मकः अस्थात्।१०१।

द्वारकेला सांगितलेला आचार इथे केल्यास द्वारकेच्या चौपट फळ मिळते. इथे स्नान केल्याने पतितही ज्ञानी होतो आणि त्याच्या अस्थी चक्रांकित होतात.९८. गाणगापूरच्या पूर्वभागात कल्लेश्वराचे मंदिर आहे. इथे गोकर्ण महाबळेश्वरासारखे सिद्धिप्रद मन्मथ तीर्थ आहे. इथे श्रावण महिन्यात शंकराला अखंड अभिषेक केल्याने तसेच कार्तिक महिन्यात दीपोत्सव केल्याने सर्व सिद्धी आणि मोक्ष लाभतात.

अशी ही परिपूर्ण तीर्थयात्रा श्रीगुरूंनी त्या लोकांना सांगितली. त्यांनीही आनंदभराने तसेच आचरण केले. असे हे क्षेत्र महान् आहे हे जाणून समस्तज्ञानस्वरूप श्रीगुरू तिथे राहिले.१०१. (पुढच्या अध्यायात) म्लेच्छाचा उद्धार करून भाविकांसाठी कामधेनूच असलेले श्रीगुरू तिथेच राहिलेले आहेत. साक्षात् परमेश्वर असूनही अज्ञानाच्या अंधाराने आंधळ्या झालेल्या जनांना ते दिसत नाही, जसा जन्मांधाला सूर्य दिसत नाही.

**म्लेच्छं समुद्धृत्य ततोऽखिलात्मा तत्र स्थितो भाविककामधेनुः ।**
**प्रत्यक्ष ईशोऽपि न दृश्यतेऽसाववित्तमोऽन्धैररुणो यथान्धैः ।।१०२।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे क्षेत्रमाहात्म्यवर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः द्वाविंशोऽध्यायः ।।**

ततः म्लेच्छं समुद्धृत्य अखिल+आत्मा भाविक+कामधेनुः तत्र स्थितः। असौ प्रत्यक्ष ईशः अपि अवित्+तमः+अन्धैः न दृश्यते, यथा अन्धैः अरुणः।१०२।

मागील श्लोकांत सांगितलेले अमृतत्व (मोक्ष) सापेक्ष (relative) समजावे. कारण ते पुण्याने उत्पन्न होते म्हणजे ते गृहादिकांसारखे नाशिवंतच होय. 'प्रलयानंतरही जे राहते त्या स्थानाला अमृतत्व म्हणतात,' *(आभूतसंप्लवं स्थानममृतत्ववमिति भाष्यते)* या विष्णुपुराणाच्या (२:८:९६) व्याख्येनुसार हे आत्यंतिक (absolute) अमृतत्व ठरत नाही. आत्यंतिक अमृतत्व आत्मसाक्षात्कार. ते पुरोडाशाप्रमाणे उत्पाद्य नाही, सोमासारखे विकार्य नाही, मंत्रासारखे प्राप्य (सिद्ध करणे) नाही किंवा साळीसारखे संस्कार्य नाही. 'जीवमात्रांमध्ये स्थित असलेला एकच आत्मा आहे.' *(एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः।)* या ब्रह्मबिंदूपनिषदाच्या(१२) वचनानुसार आत्मा एकमेव, सम आणि अविनाशी आहे. 'सर्वच भूतांमध्ये सारखाच अवस्थित असलेला आत्मा' असे गीतेचेही(१३:२७) वचन आहे. अशा आत्म्याला कसली आशा वा अपेक्षा असूंच शकत नाही. केवळ मिथ्या ज्ञानानेच त्याला अशा आशा-अपेक्षा होऊं शकतात. आकाशाप्रमाणे निष्क्रिय, दुःखाचा संसर्गही नसलेल्या परमानंदस्वरूप आत्म्याला, 'मला दुःख होऊं नये, मला सुख व्हावे,' अशी इच्छा किंवा 'माझे शरीर बलशाली आहे, मी समर्थ आहे' असा अभिमान मिथ्याज्ञानाविना संभवतच नाही. मिथ्याज्ञान असलेल्या आत्म्यालाच, 'मला पत्नी असावी म्हणजे मला संतति होईल, मला संपत्ती मिळावी म्हणजे मी कर्मे करीन' (बृहदारण्यक उपनिषद १:४:१७) असे वाटते. कारण तो स्वतःला यांच्यावांचून अपूर्ण मानतो. जेव्हां

त्याच्या जायादि कोणत्याच बाह्य इच्छा पूर्ण होत नाहीत तेव्हां तीच श्रुति त्याला त्याचे 'मन हाच आत्मा, वाचा हीच जाया, प्राण हीच संतति' इत्यादि संपत्तींचा निर्देश करते. हे अज्ञानाचेच लक्षण आहे. कारण मन इत्यादींविषयी आत्मत्वादि अभिमान अज्ञानांतूनच उगम पावतो. जसा बाह्यकामिनी न मिळालेला पुरुष झोंपेत मनानेच कल्पिलेल्या कामिनीचा उपभोग घेतो तसा स्वर्गादींची इच्छा करणारा यज्ञांचे अनुष्ठान करून स्वप्नतुल्य अशा सातिशय पण अनित्य अशा स्वर्गसुखांत निमग्न होतो. त्याला स्वर्गलोकांतून परत भूलोकांत यावेच लागते. मुंडकोपनिषदांत (१:२:९-१०) सांगितल्याप्रमाणे, 'आसक्तीने कर्म करणाऱ्या लोकांना सत्याचे ज्ञान नसल्याने, त्यांनी कर्मांनी प्राप्त केलेल्या लोकांपासून (त्या कर्माचे फळ संपल्यावर) ढळतात आणि खालच्या लोकांत पडतात. त्या विमूढांना इष्ट आणि पूर्त हेच श्रेष्ठ वाटतात. दुसरे कांही श्रेयस्कर कर्म ते जाणतच नाहीत. आपल्या कर्मांनी कमावलेल्या स्वर्गलोकातील सुखांचा भोग घेऊन ते परत ह्या भूलोकांत येतात किंवा आणखी खालीही जाऊं शकतात.' भगवद्गीतेतही (९:२१) *'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलाकं विशन्ति। '* असे म्हटले आहे.

याप्रमाणे मुमुक्षु जर मंदप्रज्ञ असेल तर त्याला श्रुति स्वर्गसाधनभूत यज्ञांचा उपदेश करते. तो मुमुक्षु जर ज्ञानी असेल तर श्रुति त्याला अध्यात्मयज्ञाच्या अनुष्ठानाचा उपदेश करते. त्याचप्रमाणे काशीला जाण्याला अशक्त असणाऱ्या पण आत्मशुद्धीची इच्छा असणाऱ्यांना त्यांच्या निकटच असलेल्या सर्व तीर्थ आणि देवतांनी युक्त अशा स्थानाला 'हीच काशी' असे सांगून त्या गाणगापूरचे काशीशी असलेले साम्य प्रकट केले. हा झाला वरील तीर्थनिरूपणाचा बाह्य अर्थ.

**तीर्थनिरूपणाचा आंतरिक अर्थ -** कलियुगांतील मंदबुद्धीच्या मानवांना देहांतच विद्यमान असलेल्या संसारांतून तरण्याचे ध्यानादि उपाय (तीर्थे) ठाऊक नाहीत. म्हणून त्यांना जाणवून देण्यासाठी श्रीगुरु त्यांना म्हणाले. ७५. काशी म्हणजे प्रकाशणारे, तेजस्वी म्हणजेच ज्ञान असा अर्थ घेऊन, काशीला जाऊं इच्छिणाऱ्या म्हणजे ज्ञानाची जिज्ञासा,

मुमुक्षा असणाऱ्या लोकांना उद्देशून ते म्हणातात. 'सर्व तीर्थे (ज्ञानाची साधने) इथे ह्या गंधर्वनगरांत - म्हणजेच दृष्टनष्टस्वरूप देहांतच आहेत.' ७६. इडा, पिंगला आणि सुषुम्णा (*इडा भगवती गङ्गा पिंगला यमुना नदी। तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती।।* पद्मपुराण) ह्यांचा संगमभूत हे आज्ञा चक्र हेच प्रयाग आहे. सात्त्विकभावरूपी अष्ट तीर्थे इथे आहेत. सुषुम्णा मार्गावरील मूलाधारादि सहा चक्रे हीच ह्या संगमाचे सहा कांठ आहेत. ही सुषुम्णाच क्रममुक्तीरूप इष्टफल देणारी अमरजा नदी होय. कठोपनिषदांत (२:३:१६) सांगितल्याप्रमाणे 'हृदयांतून जाणाऱ्या शंभर नाड्यांपैकी मस्तकांतून बाहेर पडणारी हीच एक नाडी आहे. तिच्यांतून वर जाणाराच अमृतत्व पावतो.' किंवा त्रिवेणीसंगम म्हणजे 'तत्', 'त्वं' आणि 'असि' ह्या तीन पदांचा योग असणारे महावाक्य असाही अर्थ करतां येतो.७७.जालंधरासुर मनाच्या स्वाभाविक वृत्ती (instincts) आणि त्यांच्या विरुद्ध प्रकाशरूप देव यांच्यांतल्या छांदोग्य उपनिषदांत (१:२:१) वर्णन केलेल्या युद्धांत, *'इंद्रायेन्द्रो परिस्रव'* (ऋग्वेद ८:९१:३) वचनानुसार ईश म्हणजे आत्म्याने, इन्द्र म्हणजे जीवाला दिलेले म्हणजे सहस्रार चक्रांतून स्रवणारे अमृत जाणावे. ७८. स्वरूपाचे विस्मरण (प्रमाद) हाच कालमृत्यु; ज्याच्यामुळे भय होते ते द्वैत हेच **भय** शब्दाने सूचित केले आहे. **अघ** म्हणजे आत्म्याच्या हत्येचे पाप. निर्दोष माणसावर मिथ्यारोप करणे हा त्याची शस्त्रावांचून केलेली हत्याच ठरते. तद्वत् नित्य, शुद्ध बुद्ध आत्मस्वरूपावर पापित्वादि आरोप (अध्यास) ही त्याची हिंसाच होय. *'असुर्या नाम ते लोका'* या ईशावास्योपनिषदाच्या मंत्रावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी असे म्हटले आहे कीं, 'अविद्येच्या दोषाने विद्यमान आत्म्याचा तिरस्कार केल्याने विद्यमान आत्म्याची अजर, अमर इत्यादि लक्षणे जाणीवेतून जातात. एखाद्याला ठार केल्यावर त्याचा प्रभाव नाहीसा होतो तसेच हे आहे. यासाठीच प्राकृत अज्ञानी जीवांकडून आत्म्याच्या हत्येचे पाप घडते.' महाभारतांतही *'किं तेन न कृतं पापं चोरणात्मापहारिणा।'* असे म्हटले आहे. ७९. मनोरथ तीर्थ म्हणजे भक्ति. संतोष हेच संतोषतीर्थ. *रुतं* म्हणजे शोक त्याला *द्रावयति* म्हणजेच पळवतो तो **रुद्र** अर्थात् सात्त्विक अहंकार. नेहमी त्याच्याबरोबरच राहणारा आणि आनंददायी विवेक म्हणजेच **नंदी**.

८०. **शैवी प्रदक्षिणा** याचा अर्थ श्रवण, मनन, निदिध्यासन यांची वरचेवर केलेली आवृत्ती. ८१. **ईश** म्हणजे आत्मा त्याचे दर्शन म्हणजे ' तोच मी आहे' अशी अपरोक्ष अनुभूति. तिच्यामुळे होणारी इष्टप्राप्ती आणि अनिष्टनिवृत्ती वर सांगितलीच आहे. ८२. पुढे ९३ व्या श्लोकापर्यंत सांगितलेला इतिहास विश्वास निर्माण व्हावा यासाठी सांगितला आहे. रत्नाबाईचे कुष्ठ हे जन्ममरणरूपी संसाराचेच रूपक आहे. तिला तीन दिवस स्नान करायला सागितले ज्ञानाभ्यासाचेच उपलक्षण आहे.९४. **कोटितीर्थ** म्हणजेच गीतेत 'या ज्ञानासमान पवित्र या जगांत कांहीच नाही (*न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।)'* असे गौरविलेले विशुद्ध ज्ञान.९५. 'या इथे **संक्रमणं** ह्याचा अर्थ इडा आणि पिंगला यांचे सम्यक् क्रमण. इडेचे क्रमण करून प्राण मूलाधाराशीं आला कीं चंद्रग्रहण, पिंगलेंतून मूलाधारांत प्राण आला कीं सूर्यग्रहण, इडा-पिंगलांच्या संधीला (आज्ञाचक्र) प्राण पोंचला कीं अमावास्या, इडेंतून प्राण पिंगलेंत जाणे दक्षिणायन व पिंगलेंतून इडेंत प्राणाचे गमन हे उत्तरायण असे सूतसंहितेंत वर्णन आहे. त्याचा दाखला श्रीस्वामीमहाराजांनी टीकेंत पुढे दिला आहे.९६. उदरालंबन म्हणजे नाभीजवळचे मणिपूर चक्र हीच **गया.** पांच छिद्रांचे हृत्कमल (अनाहत चक्र) हीच द्वारका. कारण तिथेच श्रीकृष्णपरमात्म्याचे वास्तव्य आहे.९७-९८. सुसिद्धिदं (उत्तम सिद्धि देणारे) मन्मथक्षेत्र म्हणजेच ब्रह्मरंध्र (सहस्रार चक्र होय). किंवा अनाहताला **मन्मथ क्षेत्र** आणि ब्रह्मरंध्राला द्वारका असा व्यत्यास केला तरी चालेल. आत्मपुराणांत म्हटले आहे, *'स देवदेवजनकः कपालत्रयमध्यमां। सिमंतिनीनां सीमंते सीमांता विदितां नृणाम्। ततो मनुष्यमात्रस्य पुरा द्वारवती स्मृता। अस्यां यस्मादयं कृष्णः पुराणपुरुषोऽविशत्। ऊर्ध्वभागे ततो द्वारं विद्वद्भिः कीर्त्यते बुधैः।।'* 'तीन कपाळांच्या मध्यभागी स्त्रियांच्या भांगाजवळच्या सीमेला मनुष्यमात्रांची द्वारवती (द्वारका) आहे. त्याच्या वरच्या भागीं ज्ञानी लोकांनी वर्णन केलेले द्वार (ब्रह्मरंध्र) आहे. तो देवदेवांचा (ब्रह्मदेवाचा) पिता, जीवभूत श्रीकृष्णपरमात्मा या ब्रह्मरंध्रांचा भेद करूनच देहामध्यें प्रवेश करतो. त्यामुळे हीच मनुष्यमात्रांची द्वारका होय'१००. असे सर्व नरदेहाचे माहात्म्य श्रीगुरूंनी सांगितल्याने आणि मोक्षमार्गाची सुगमता कळाल्याने ते लोक आनंदित झाले.

हे क्षेत्र, म्हणजे गंधर्वनामक हा देह, श्रेष्ठ आहे. विज्ञान म्हणजे बुद्धी ज्याची उपाधि आहे असे आत्मस्वरूप तिथे अवस्थित आहे. १०१. इथे असा प्रश्न उपस्थित केला जाऊं शकतो की *'द्वा सुपर्णा'* (ऋग्वेद १:१६४:२०) या श्रुतींत दोघांचे अस्तित्व प्रतिपादले असतांना इथे एकाचाच निर्देश कसा केला? त्याचा खुलासा प्रस्तुत श्लोकांत केला आहे. तो अखिलात्मा असूनही प्रतिबिंबरूप असल्याने उपाधीच्या मालिन्याने म्लेच्छ म्हणजे अस्पष्ट उच्चार करणारा - अस्पष्ट आविष्कृत होणारा चिदाभास, त्याचा उद्धार करून शुद्ध आत्मस्वरूपच हार्दाकाशांत स्थिरावले असा आशय आहे. १०२.

प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ त्रयोविंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**साधु साधूदितं क्षेत्र-माहात्म्यं लोकपावनम् । जगन्निवासो भगवान् यत्रोवासैष लीलया ।।१।।**
**तत्र तत्राखिला देवा ऋषियोगिमुनीश्वराः । निवसन्ति पुनस्तत्र ननु तीर्थानि सर्वशः ।।२।।**
**कृष्णापञ्चनदीयोगो धन्योऽन्योऽप्येष तादृशः । स भीमामरजायोगः साक्षात्तु भगवानिह ।।३।।**
**पशुपक्षिमृगा मीनास् तत्रत्याः स्नानपानतः । धन्या एव पुनर्नृणां धन्यत्वं किमु वर्ण्यते ।।४।।**

नामधारक उवाच। लोक+पावनं क्षेत्र+माहात्म्यं साधु साधु उदितम्। एष जगत्+निवासः भगवान् यत्र लीलया उवास।१। तत्र तत्र अखिलाः देवा++ऋषि+योगि+मुनि+ईश्वराः निवसन्ति। पुनः तत्र सर्वशः तीर्थानि (अपि निवसन्ति)।२। कृष्णा+पञ्चनदी+योगः धन्यः। अन्यः अपि तादृशः एष भीमा+अमरजा+योगः सः भगवान् तु इह साक्षात् (वर्तते)।३। तत्रत्याः पशु+पक्षि+मृगा+मीनाः स्नान+पानतः धन्याः एव। पुनः नृणां धन्यत्वं किम् उ वर्ण्यते?४।

श्रीगणेशाय नमः। *तेविसाव्यांत म्लेच्छ राजाचा करूनि उद्धार। अदृश्य झाला अभक्तांना, परि प्रत्यक्ष आजही भक्तांना।।२३।।* श्रीगुरू उगी राहिलेले पाहून नामधारक दहा श्लोकांत त्यांना विचारीत आहे. 'छान छान! सर्व जनांना पावन करणारे क्षेत्रमाहात्म्य आपण फार उत्तम सांगितलेत. हा जगन्निवास भगवंत लीलेने जिथे जिथे निवास करतो,(१) तिथे तिथे सर्व देव, ऋषी, मुनी राहतात. त्यांच्याबरोबरच साहजिकच सर्व तीर्थेही तिथे येतात.२. कृष्णा आणि पञ्चगंगा यांचा संगमही श्रीगुरूंच्या निवासाने धन्य झाला आहे. तसाच हा दुसरा भीमा आणि अमरजा यांचा संगम भगवंताच्या साक्षात् वास्तव्याने धन्य झाला आहे.३. या संगमाच्या जलात स्नान करून आणि ते पिऊन येथील पशू, पक्षी आणि जलचरही धन्य झाले आहेत. मग येथील मानवांची धन्यता किती म्हणून वानावी?४.

**यन्माहात्म्यश्रवणतो लीयन्ते पापराशयः । किं पुनस्तन्निवसतां सतां वाच्या हि सद्गतिः ।।५।।**
**भगवद्भक्तियुक्ता ये मुक्तिस्तेषां करे स्थिता । मुक्तिं ते परिभाव्यातो भक्तिमेवाश्रयन्त्यरम् ।।६।।**
**मुक्त्यपेक्षा पुराभून्मे सा भवत्कृतबोधतः । व्यपेता दूरतो वृद्धाहैतुकीभक्तियोगतः ।।७।।**
**अतः प्रियतमं विष्णोः कीर्तनश्रवणादिकं । तद्गुणश्रवणं श्राव्यं रोचते मे विशेषतः ।।८।।**
**तस्मात्स्वर्गायचरित-पूरितात्मन्वदस्व मे । श्रीगुरोश्चरितं रम्यं मङ्गलं पावनं परम् ।।९।।**
**को म्लेच्छः सोऽतिहीनोऽपि कृपापात्रं परात्मनः । कथं जातो हि भवता यत्तूक्तं म्लेच्छ उद्धृतः ।।१०।।**

यत्+माहात्म्यं श्रवणतः पाप+राशयः लीयन्ते तत्+निवसतां सतां सद्गतिः हि किं पुनः वाच्यते?५। 'ये भगवत्+भक्ति+युक्ता मुक्तिः तेषां करे स्थिता। अतः ते मुक्तिं परिभाव्य अरं भक्तिं एव आश्रयन्ति।६। पुरा मे मुक्ति+अपेक्षा अभूत्। सा भवत्+कृत+बोधतः अहैतुकी+भक्ति+योगतः दूरतः व्यपेता।७। अतः विष्णोः कीर्तन+श्रवण+आदिकं प्रियतमम्। तत्+गुण+श्रवणं मे विशेषतः रोचते।८। तस्मात् (हे) स्वर्गाय+चरित+पूरित+आत्मन्, मे श्रीगुरोः रम्यं, मङ्गलं पावनं परं चरितं वदस्व।९। कः सः म्लेच्छः? अति+हीनः अपि पर+आत्मनः कृपा+पात्रं जातः? यत् हि भवता उक्तं 'म्लेच्छ उद्धृतः।'१०।

ज्या गाणगापूर क्षेत्राचे माहात्म्य कानांवर पडल्यानेही पापांच्या राशी नष्ट होतात तिथे राहणाऱ्या सज्जनांच्या सद्गतीविषयी कितीही वर्णन केले तरी अपुरेच ठरणार आहे.'५. 'भगवंताची भक्ती ज्यांना लाभली आहे त्यांना मुक्ती करतलावरच असते. म्हणून ते मुक्तीचा अनादर करून भक्तीचाच आश्रय करतात.६. मलाही पूर्वी मुक्तीची अपेक्षा होती. पण आपण केलेल्या उपदेशाने ही अहैतुकी भक्ती प्राप्त झाल्याने मुक्तीची इच्छा दूर झाली.७. आता मला सर्वव्यापी श्रीगुरूंचे कीर्तन, श्रवण, अर्चन इत्यादि अत्यंत प्रिय वाटतात. विशेषतः त्यांच्या गुणांचे श्रवण मला फारच आवडते!८. त्याकरिता स्वर्गातही गायल्या जाणाऱ्या गुरुचरित्राने ज्यांची बुद्धी संपृक्त झाली आहे अशा सिद्धमुने, मला श्रीगुरूंचे रम्य, मंगल आणि पावन चरित्र सांगा.९. तो म्लेच्छ कोण जो श्रीगुरुपरमात्म्याच्या कृपेला पात्र झाला? कारण आपण म्हणत होता की एका म्लेच्छाचा श्रीगुरूंनी उद्धार केला!'१०.

### ।। सिद्ध उवाच ।।

**धन्योऽसि तेऽद्य भगवत्प्रसादान्मतिरीदृशी । अतस्तच्चरितं वक्तुमानन्दोऽतीव वर्धते ।।११।।**
**यदा स्थितः कुरुपुरे प्रत्यक्षं श्रीपदस्तदा । रजकः प्रत्यहं भेजे तं स्तोत्रैर्नतिभिः सदा ।।१२।।**
**कदाचिदाह तं तुष्टः श्रीपादो भाविकोऽसि रे । कुर्वकण्टकसाम्राज्यं तच्छ्रुत्वा सोऽतिहर्षितः ।।१३।।**
**सोऽलङ्कृतं नृपं नद्यां क्रीडन्तं युवतीयुतम् । चतुरङ्गबलोपेतं दृष्ट्वा स्वगतमब्रवीत् ।।१४।।**

सिद्ध उवाच। धन्यः असि! अद्य भगवत्+प्रसादात् ते ईदृशी मतिः। अतः तत्+चरितं वक्तुं आनन्दः अतीव वर्धते।११। यदा कुरुपुरे प्रत्यक्षः श्रीपदः स्थितः तदा रजकः तं प्रति+अहं सदा स्तोत्रैः नतिभिः भेजे।१२। कदाचित् तुष्टः श्रीपदः तं आह, 'रे, भाविकः असि। अकण्टकं साम्राज्यं कुरु!' तत् श्रुत्वा सः अति+हर्षितः।१३। सः नद्यां क्रीडन्तं अलङ्कृतं युवतीयुतं चतुः+अंग+बल+उपेतं नृपं दृष्ट्वा स्व+गतं अब्रवीत्।१४।

वरच्या श्लोकांतले **स्वर्गाय** पद वेगळे काढून स्वर्गासाठी - कर्मनिष्ठांसाठी स्वर्गप्राप्ती आणि मुमुक्षूसाठी (सु+अर्ग) चांगल्या ज्ञानप्राप्तीसाठी जे गाइले जाते असा दुहेरी अर्थ करता येतो.

सिद्धमुनी उत्तरले, 'धन्य आहेस! आज भगवंताच्या प्रसादानेच तुला अशी बुद्धी झाली आहे. त्यामुळे त्या श्रीगुरूंचे चरित्र सांगण्याला मला अतीव आनंद वाटतो आहे.'११. श्रीगुरू (सातव्या अध्यायात सांगितलेल्या) कुरुगड्डीला असताना एक परीट प्रतिदिन सदा श्रीगुरूंची नमस्कार आणि स्तोत्र यांसह सेवा करीत असे.१२. त्या सेवेने संतुष्ट झालेले श्रीगुरू एकदा त्याला म्हणाले, 'अरे रजका, तू भाविक आहेस! तू अकंटक (शत्रूरहित) साम्राज्याचा अधिपती होशील!' ते ऐकून त्याला खूप आनंद वाटला.१३. त्याने एकदा एक वस्त्रे आणि भूषणे यांनी सजलेला यवन राजा नदीत क्रीडेला आलेला पाहिला. त्याच्याबरोबर अनेक तरुण स्त्रिया, चतुरंग सेना इत्यादि राजपरिवारही होता.१४.

**गुरुः कोऽस्य कुतस्त्वीदृग्-भाग्यं तज्जीवितं वरम् । क्व वार्तास्य मयीत्येतज्-ज्ञात्वा श्रीपाद आह तम् ॥१५॥**
**ज्ञातं ते हृद्गतं त्वत्र जरन्नार्होऽसि जन्मनि । राज्यं भोक्तुमतो भुङ्क्ष्व जन्मन्येष्येऽर्पितं ध्रुवम् ॥१६॥**
**सम्मतं भवदुक्तं हि यूनो राज्यरसज्ञता । राज्येऽप्यस्तु स्मृतिस्ते म इति तं स स्म याचते ॥१७॥**
**श्रीपादोऽपि तथेत्यूचे प्रेत्यापि रजकस्ततः । वैडूर्यनगरे म्लेच्छः सार्वभौमोऽभवन्नृपः ॥१८॥**

'अस्य गुरुः कः? कुतः ईदृक् भाग्यम्? तत् जीवितं वरम्! मयि अस्य क्व वार्ता?' एतत् ज्ञात्वा श्रीपाद तं आह।१५। 'ते हृत्+गतं ज्ञातम्। अत्र जन्मनि जरन् राज्यं भोक्तुं अर्हः न असि। अतः एष्ये जन्मनि ध्रुवं (राज्यं) अर्पितम्। भुंक्ष्व।'१६। 'भवत्+उक्तं संमतं हि। यूनः राज्य+रस+ज्ञता। राज्ये अपि मे ते स्मृतिः अस्तु,' इति सः तं याचते स्म।१७। श्रीपादः अपि 'तथा' इति ऊचे। ततः रजकः अपि प्रेत्य वैडूर्यनगरे सार्वभौमः म्लेच्छः नृपः अभवन्।१८।

त्या राजाला पाहून त्याच्या मनात विचार आला, 'कोण ह्या राजाचा गुरू असेल? कसे त्याला एवढे ऐश्वर्य मिळाले असेल? त्याचे जीवन हे खरे जीवन आहे! माझ्यासारख्याला अशा भाग्याची वार्ता तरी कुठली?' त्याच्या मनातील हे विचार श्रीपादप्रभूंनी ओळखले आणि त्याला म्हणाले.१५.

'तुझ्या मनातली वासना मी जाणली आहे. या जन्मात आता तू वृद्ध झाला आहेस. हे वय राज्य भोगण्याला योग्य नाही. तेव्हा तुला पुढच्या जन्मात निश्चयपूर्वक राज्य दिले. ते तू सुखाने भोग!'१६. 'आपले म्हणणे मान्य आहे, महाराज! बालपणी रसचंदनादि भोगांचे अज्ञान असते तर म्हातारपणी ते ज्ञान असूनही ते भोगण्याची शक्ती नसते. त्यामुळे ते सर्व राज्यभोग तारुण्यातच सुखकारक असतात. मात्र त्या राज्यातही मला आपली स्मृती असावी हीच प्रार्थना आहे.' अशी त्याने याचना केली.१७. श्रीपादांनीही 'तथास्तु' म्हणून आशीर्वाद दिला. त्यानंतर थोड्याच काळात तो परीट भक्त मृत्यू पावला आणि त्याचा जन्म बिदर येथे राजघराण्यात झाला. श्रीगुरूंच्या आशीर्वादानुसार तो सार्वभौम यवन राजा झाला.१८.

**म्लेच्छधर्मारुचिः पूर्व-संस्काराद्देवविप्रभाक् । शुद्धात्मा दानधर्मज्ञः सर्वभूतसमोऽभवत् ।।१९।।**
**तं तत्पुरोहिता ऊचुः स्वधर्मं सेवयोत्तमम् । मृषोद्यवर्णधर्मोऽयमग्राह्यो मनसाप्यसन् ।।२०।।**
**मुखाद्यावयवैर्देह-साम्ये वर्णक्रमः कथम् । अचेतनोपलेध्मादौ देवतान्यत्र वा कथम् ।।२१।।**
**राजा तानाह धीमान्द्यमिदं सृष्टं परात्मना । गुणकर्मभिदा चातुर्वर्ण्यं देवस्तु सर्वगः ।।२२।।**

पूर्व+संस्कारात् म्लेच्छ+धर्म+अरुचिः देव+विप्र+भाक् शुद्ध+आत्मा दान+धर्म+ज्ञः सर्व+भूत+समः अभवत्।१९। तं तत्+पुरोहिताः ऊचुः। उत्तमं स्वधर्मं सेवय। अयं वर्ण+धर्मः मृषा+उद्यः मनसा अपि अग्राह्यः असन्।२०। मुखा+आदि+अवयवैः देह+साम्ये वर्ण+क्रमः कथम्? अचेतन+उपल+इध्म+आदौ अन्यत्र वा देवता कथम्?२१। राजा तान् आहे, 'इदं धी+मान्द्यम्! पर+आत्मना गुण+कर्म+भिदा चातुः+वर्ण्यं सृष्टम्। देवः तु सर्वगः।'२२।

बृहदारण्यक उपनिषदात (४:४:२) सांगितल्याप्रमाणे पहिल्या जन्मातील ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन तो जन्माला आला होता. पूर्वजन्मीच्या संस्कारांनी त्याला यावनी धर्माची आवड नव्हती. देवाब्राह्मणांचा तो आदर करीत असे. तो शुद्ध बुद्धीचा, दानधर्माची जाण असलेला, सर्व जीवमात्रात समभाव बाळगणारा असा झाला.१९. त्याला त्याच्या धर्मगुरूंनी सांगावे, 'राजेसाहेब, आपण आपला ह्या उत्तम यवनधर्माचे पालन करावे. हा जो वर्णाश्रमधर्म आहे तो मिथ्या आहे असे आपले धर्मशास्त्र सांगते. तो धर्म मनातही आणू नये इतका वाईट आहे.'२०. ते यावनी पुरोहित पुढे सांगतात, 'तोंड, हात, पाय इत्यादि अवयव सारखेच असताना हा ब्राह्मण, हा क्षत्रिय असे वर्णभेद कसे करतात? गाय, घोडे इत्यादि प्राण्यात त्यांच्या अवयवांवरून, आवाजावरून, त्यांच्या मलाच्या वेगळेपणावरून जसा भेद करता येतो किंवा स्त्री आणि पुरुषांतही योनी, लिंग आदींवरून फरक दिसतो तसा वर्णांमध्ये करता येत नाही. दगड, लाकूड, माती, सोने इत्यादि अचेतन वस्तूंच्या प्रतिमांत तसेच पाणी, अग्नी यांच्यात देवत्व कसे येईल?'२१. राजा त्यांचे म्हणणे खोडून टाकीत म्हणतो, 'हे तुमच्या बुद्धीचे मांद्य आहे. त्यांच्या धर्मग्रंथांत (भ.गीता ४:१३) सांगितल्याप्रमाणे हे चार वर्ण सत्त्व-रज-तम आदि गुणांच्या आणि शमदमादि कर्मांच्या विभागणीने (भ.गीता १८:४२-४४) परमेश्वरानेच केलेले आहेत. आणि देव तर सर्वव्यापी आहे असे तुम्हालाही मान्य आहेच ना? या संपूर्ण जगाचे अधिष्ठान परमात्माच आहे तेव्हा तो चेतन अचेतन अशा सर्वच वस्तूंत आहेच.२२.

**स्थूलाक्षराल्लिपिज्ञानं शिशोरिव परात्मनः । गुरूक्तार्चाकल्पनया हृत्स्थैर्याद्बोध उद्भवेत् ।।२३।।**
**सतोम्ब्वाद्येऽपि बिम्बस्य प्रतीतिर्न मलान्विते । तथात्मनो न मलिने प्रतीतिः सा तु निर्मले ।।२४।।**
**तत्स्वप्रमानादिवेद-प्रोक्तधर्मपरान् द्विजान् । नमस्कुरुत भक्त्या ते देवानामपि देवताः ।।२५।।**
**वेदानुसारिस्मृत्युक्त-धर्मकर्मानुवर्तिनः । पूज्या अतो द्वेषशङ्कां त्यजतेत्याह तान्नृपः ।।२६।।**
**ततः कालेन कियता स्फोटकोऽङ्के समुत्थितः । तेन राड् व्यथितोऽत्यन्तं मोघाभूत्तत्प्रतिक्रिया ।।२७।।**

शिशोः स्थूल+अक्षरात् लिपि+ज्ञानं इव गुरु+उक्त+अर्चा+कल्पनया हृत्+स्थैर्यात् पर+आत्मनः बोध उद्भवेत्।२३। सतः अम्बु+आद्ये बिम्बस्य प्रतीतिः, न मला+अन्विते। तथा आत्मनः मलिने न प्रतीतिः सा तु निर्मले।२४। तत् स्व+प्रम+अन+आदि+वेद+प्रोक्त+धर्म+परान् द्विजान् भक्त्या नमस्कुरुत। ते देवानां अपि देवताः।२५। 'वेद+अनुसारी+स्मृति+उक्त+धर्म+कर्म+अनुवर्तिनः पूज्याः। अतः द्वेष+शंकां त्यजत'इति नृपः तान् आह।२६। ततः कियता कालेन अङ्के स्फोटकः समुत्थितः। तेन राट् अत्यंतं व्यथितः। तत्+प्रतिक्रिया मोघा अभूत्।२७।

मूर्तिपूजेविषयी विचाराल तर लहान मुलांना जशी मोठी अक्षरे शिकवून मग सूक्ष्म लिपीचे ज्ञान करून देतात तसेच गुरूंनी सांगितलेल्या किंवा परंपरेने आलेल्या मूर्तीच्या चिंतनाने मन स्थिर झाल्यावर निराकार परमेश्वराचे ज्ञान होते.२३. पाणी असो वा आरसा असो, स्वच्छ असेल तरच त्यांत आपल्या मुखाचे वगैरे प्रतिबिंब चांगले दिसते. ते मलीन असेल तर तसे दिसणार नाही. त्याचप्रमाणे रागद्वेषादि दोषांनी चित्त मलीन असेल तरच अंतरात्म्याची प्रचीती येते.२४. हे सर्व ज्ञान ज्या वेदांत सांगितले आहे ते स्वतःप्रमाण आणि अनादि आहेत. अशा वेदांत सांगिलेल्या धर्माचे अनुसरण करणाऱ्या ब्राह्मणांना भक्तीपूर्वक नमस्कार करावा. ते देवांचेसुद्धां देव आहेत.' २५. 'वेदांनाच अनुसरणाऱ्या स्मृतींनी ग्रथित केलेल्या धर्मांचे आणि कर्मांचे अनुशीलन करणाऱ्यांचा आदरच केला पाहिजे. तरी तुम्ही त्यांचा द्वेष करू नका.' असे राजाने त्या पुरोहितांना समजावले.२६. पुढे कांही काळ गेल्यावर राजाच्या मांडीवर एक मोठा फोड झाला. त्याने राजा अगदी त्रासून गेला. त्याच्यावरे कांहीच उपाय चालेनात.२७.

**राजा यातनया त्यक्त-भुक्तिसुप्तिरतिर्द्विजम् । आहूय तत्प्रतीकारं पप्रच्छ विनयान्वितः ।।२८।।**
**स प्राह नात्र वक्तव्यं भवान्म्लेच्छो द्विजोऽस्म्यहम् । जनश्रुतिभियैकान्ते वक्तव्यं भूपसत्तमम् ।।२९।।**
**अथापतुरुभौ पाप-नाशतीर्थं द्विजोऽब्रवीत् । भो पूर्वार्जितदुष्कर्म-योगाद्रोगसमुद्भवः ।।३०।।**

यातनया त्यक्त+भुक्ति+सुप्ति+रतिः राजा द्विजं आहूय विनय+अन्वितः तत्+प्रतीकारं पप्रच्छ।२८। सः प्राह, '(हे) भूप+सत्तम, भवान् म्लेच्छः, अहं द्विजः अस्मि। अत्र न वक्तव्यम्। जन+श्रुति+भिया एकांते वक्तव्यम्।' २९। अथ उभौ पाप+नाश+तीर्थं आपतुः। द्विजः अब्रवीत्, 'भो (राजन्) पूर्व+अर्जित+दुः+कर्मात् रोग+समुद्भवः।'३०।

त्या फोडाच्या वेदनांनी राजाला खाणे-पिणे, झोप किंवा कामसेवन सुचेनात. तेव्हा त्या राजाने एका ब्राह्मणाला बोलावून त्या फोडावर उपाय विचारले.२८. तो ब्राह्मण त्याला म्हणाला, 'राजेसाहेब, आपण यवन जातीचे आहात आणि मी तर ब्राह्मण आहे. इथे आपण बोललो तर त्याचा उगीच बोभाटा होईल. तेव्हा आपण एकांतात कुठे तरी जाऊन बोलू या.'२९.

**जन्मांतराने कर्माचा भोग -** राजाला त्याचे म्हणणे पटले आणि ते दोघेही बिदरजवळच्या पापनाशी तीर्थाला गेले. तो ब्राह्मण सांगू लागला, 'माणसाला जे कांही रोग होतात ते पूर्वजन्मींच्या पापकर्मामुळेच होतात.' एका जन्मात केलेली दुष्कर्मे दुसऱ्या जन्मातल्या रोगांचे कारण कसे होतात? अशी शंका घ्यायचे कारण नाही. मृत्यू याचा अर्थ पाचभौतिक देहातून जीवाचे निष्क्रमण. देहापासून जीव वेगळा होतो. देह जरी महाभूतात विलीन झाला तरी आत राहणारा पुरुष तसाच राहतो. जोपर्यंत आत्मज्ञान होत नाही तोपर्यंत तो पुनःपुनः जन्मतो आणि मरण पावतो. छांदोग्य उपनिषदानसार 'त्याची वाचा मनात मिळून जाते, मन प्राणात, प्राण तेजात आणि तेज परदेवतेत मिळून जातात.' वर उद्धृत केलेल्या बृहदारण्यक उपनिषदाच्या मंत्राप्रमाणे '*जीव बाहेर पडला की सर्व प्राण त्याच्यामागे जातात. तो त्याचे ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन जातो.*' प्रश्नोपनिषदांत सांगितले आहे, (हृदयातील एकशे एक नाड्यांपैकी) एका वर जाणाऱ्या नाडीतून..

**दानभेषजसत्तीर्थ-देवसेवादिभिर्भवेत् । तच्छान्तिः साधुदृष्ट्यापि सर्वाघहृतिदक्षया ।।३१।।**
**पुरावन्तीपुरे धर्म-हीनोऽभूद्ब्राह्मणब्रुवः । त्यक्तकर्मा पिङ्गलाख्य-वेश्यासक्तो मदोद्धतः ।।३२।।**

तत्+शान्तिः दान+भेषज+सत्+तीर्थ+देव+सेवादिभिः भवेत्। सर्व+अघ+हृति+दक्षया साधु+दृष्ट्या अपि (तत्+शांतिः भवेत्)। पुरा अवन्तीपुरे धर्म+हीनः त्यक्त+कर्मा पिङ्गला+आख्य+वेश्या+सक्तः मद+उद्धतः ब्राह्मण+ब्रुवः अभूत्।३२।

.. उदान (नावाचा प्राण) पुण्य अधिक असेल तर पुण्यलोकांना नेतो, पाप अधिक असेल तर पापलोकांना नेतो आणि दोन्ही समान असतील तर मनुष्यलोकाला. प्राण तेजासह आत्म्याला यथासंकल्पित लोकाला नेतो.' कठोपनिषदातही (२:२:७) असेच प्रतिपादन आहे. 'आपापल्या कर्मानुसार आणि शास्त्राध्ययनानुसार जीव त्या त्या योनी पावतात.' या सर्व आगमप्रमाणांवरून कर्माचे फल देणाऱ्या ईश्वराच्या प्रेरणेने जन्मांतराचे पापच रोगादि दुःखांचे कारण आहे.३०. 'त्या रोगांचे उपशमन करण्याचे उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. **१. दान -** श्रद्धेने सत्पात्री (योग्य व्यक्तीला) केलेला धनत्याग; **२. भेषज -** आयुर्वेदात सांगितलेले औषध; **३. सत्** साधुसंत, **तीर्थ** गंगादि तीर्थस्थाने आणि **देव** विष्णू, शंकर इत्यादि यांच्या सेवेने; आदि शब्दाने जप, होम इत्यादि घ्यावेत. **४.** शेवटी सर्व पापांचे निवारण करणाऱ्या साधूच्या केवळ कृपाकटाक्षानेही रोगाची शांती होते.'३१. साधूची नुसती दृष्टी जरी पडली तर रोग कसा बरा होतो याविषयी एक आख्यान तो ब्राह्मण राजाला सांगत आहे. पूर्वी उज्जयनी नगरीत एक केवळ नामधारी ब्राह्मण राहत होता. त्याने सर्व धर्म-कर्म यांचा त्याग केला होता. पिंगला नावाच्या वेश्येत त्याचे मन अडकले होते. तो तिच्यासहच राहत असे. पैशाच्या मदाने तो उद्धट झाला होता.३२.



A- 19-23.indd 592 10/3/2013 3:41:39 PM

**तत्प्राक्पुण्यचयाद्योगी ऋषभः प्राप तत्र तौ । सेवयामासतुः प्रेम्णा पादसंवाहनादिभिः ।।३३।।**
**स्तुतोऽर्चितो भोजितोऽनु पर्यङ्के शायितोऽमले । पीततत्पादतीर्थाभ्यां तुष्टः सुष्वाप वीजितः ।।३४।।**
**सुप्तोऽपि नमितः प्रातरुत्थायागात्स संस्तुतः । इयत्पुण्येन तौ प्रेत्य जातौ ब्रह्मकुलेऽमले ।।३५।।**
**वज्रबाहोर्दशार्णेशो महिष्याः कुक्षिमाप सः । तत्सपत्नी तदा द्वेषाद् गर्भिण्यै गरलं ददौ ।।३६।।**

तत्+प्राक्+पुण्य+चयात् ऋषभः योगी तत्र प्राप। तौ प्रेम्णा पाद+संवाहनादिभिः सेवयामासतुः।३३। पीत+तत्+पाद+तीर्थाभ्यां स्तुतः अर्चितः भोजितः अनु अमले पर्यंके शायितः तुष्टः।३४। सुप्तः अपि नमितः। प्रातः उत्थाय सः संस्तुतः अगात्। इयत् पुण्येन तौ प्रेत्य अमले ब्रह्म+कुले जातौ।३५। सः दशार्ण+ईशः वज्रबाहोः महिष्याः कुक्षिं आप। तदा तत्+सपत्नी द्वेषात् गर्भिण्यै गरलं ददौ।३६।

त्याच्या कांही पूर्वपुण्याईने तिथे एकदा महान योगी ऋषभदेव आले. त्या ब्राह्मणाने आणि त्या वेश्येने मिळून त्यांची प्रेमाने, पाय चेपून वगैरे सेवा केली.३३. त्यांच्या पायाचे तीर्थ घेतले. त्यांची गोड शब्दांनी स्तुती केली; पूजा केली; त्यांना जेवायला घातले; आणि चांगल्या पलंगावर त्यांची झोपायची सोय केली; त्यांना पंख्याने वारा घातला. अशा रीतीने त्यांनी त्या मुनींना प्रसन्न केले.३४. ते झोपल्यावरही त्यांनी जागून त्यांची झोपमोड होऊ दिली नाही. ते उठल्यावर त्यांना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. त्यानंतर ते ऋषभदेव आले तसे आपल्या वाटेने निघून गेले. त्या ऋषिसेवेच्या पुण्याईने ते दोघेही मृत्यूनंतर शुद्ध राजकुलात जन्माला आले.३५. ती वेश्या दशार्ण देशाचा राजा वज्रबाहू याची पट्टराणी झाली आणि तो ब्राह्मण तिच्या पोटी आला. तेव्हा तिच्या सवतीने मत्सराने त्या गरोदर राणीला विष घातले.३६.

**तेन विद्धापि न मृता दैवात्सा सुषुवे सुतम् । बालोऽपि विषविद्धोऽभूदुभौ जातौ व्रणाङ्किकतौ ।।३७।।**
**तदार्तिर्न शशामापि नानोपायैरुभौ सदा । क्रन्दमानौ निराहार-निद्रौ क्षीणौ तु कृच्छ्रतः ।।३८।।**
**राजैकदा पूतिगन्धि-त्रस्तस्तद्वीक्षणात् क्षणात् । सूतमाज्ञाप्य सार्भां तां गमयामास कानने ।।३९।।**
**घोरेऽरण्येऽपि तौ त्यक्त्वा राज्ञे सूतः शशंस तत् । ततो रेमेऽन्यभोगिन्या क्रूरो राजातिहृष्टया ।।४०।।**
**घोरसत्त्वे वने राज्ञी विजने व्रणकर्शिता । अज्ञाताङ्घ्रिगतिस्तन्वी त्रस्ताभूत्कण्टकोपलैः ।।४१।।**

(सा) तेन विद्धा अपि न मृता। सा दैवात् सुतं सुषुवे। बालः अपि विष+विद्धः अभूत्। उभौ व्रण+अङ्कितौ जातौ।३७। तत्+आर्तिः नाना+उपायैः अपि न शशाम। उभौ सदा क्रंदमानौ निः+आहार+निद्रौ कृच्छ्रतः तु क्षीणौ।३८। एकदा राजा तत्+वीक्षणात् पूति+गन्ध+त्रस्तः क्षणात् सूतं आज्ञाप्य तां स+अर्भां कानने गमयामास।३९। सूतः अपि तौ घोरे अरण्ये त्यक्त्वा राज्ञे शशंस। ततः क्रूरः राजा अति+हृष्टया अन्य+भोगिन्या रेमे।४०। घोर+सत्त्वे विजने वने व्रण+कर्शिता अ+ज्ञात+अङ्घ्रि+गतिः तन्वी राज्ञी कण्टक+उपलैः त्रस्ता अभूत्।४१।

पण त्या राणीला त्या विषाची बाधा झाली तरी तिचा मृत्यू झाला नाही. तिच्या सुदैवाने तिने मुलाला जन्म दिला. त्या मुलालाही ते विष बाधले. त्यामुळे दोघांनाही सर्वांगावर व्रण झाले.३७. त्यांच्या त्या रोगावर अनेक उपाय करूनही तो शमला नाही. दोघेही सारखे दुःखाने आक्रोश करायचे. त्यांना न धड आहार ना धड झोप मिळत होती. त्या कष्टांनी ते अगदी क्षीण होऊन गेले.३८. एकदा त्यांची ती अवस्था पाहून आणि त्यांच्या पू आणि दुर्गंधाला विटून राजाने आपल्या सारथ्याला त्यांना तत्काळ अरण्यात सोडून यायची आज्ञा केली.३९. त्याप्रमाणे त्या सारथ्यानेही त्याना रथात घालून दूर निबिड अरण्यात सोडून दिले आणि तसे राजाला येऊन सांगितले. त्या दुष्ट राजाला खूप आनंद झाला आणि तो दुसऱ्या अनभिषिक्त राणीबरोबर रममाण झाला.४०. त्या हिंस्र पशूंनी व्याप्त अशा निर्जन अरण्यात ती अंगावरच्या व्रणांनी पीडलेली, आपली पाउले कुठे पडताहेत याचीही शुद्ध नसलेली रूपवती राणी खड्या-काट्यांनी ठेचकाळत होती. हातात लेकरू घेऊन ती आपल्या दैवालाच बोल लावू लागली.४१.

**धृतार्भा प्राह हा दैव कष्टमीदृक् प्रदर्शितम् । सार्भा खादय हिंस्रैर्मां दुःखबन्धाद्विमोचय ।।४२।।**
**एवं सा विलपन्ती गाः प्रेक्ष्याग्रे मन्दगामिनी । आगत्य प्राह गोपान्भो तृषोत्क्रामन्ति मेऽसवः ।।४३।।**
**तामूचुस्तेऽम्बिवहास्त्यारान् मन्दं सृत्यानया व्रज । सापि गत्वाम्बु पीत्वोचे सरस्तीरस्थ योषितः ।।४४।।**
**कोऽत्र राजा प्रजा हृष्टा भान्ति मे ब्रूत योषितः । ता ऊचुस्त्वत्र राड्वैश्यः साधुः पद्माकरः कृती ।।४५।।**

धृत+अर्भा प्राह, 'हा दैव! ईदृक् कष्टं प्रदर्शितम्। मां स+अर्भा हिंस्रैः खादय। दुःख+बन्धात् विमोचय।'४२। एवं विलपन्ती सा अग्रे गाः प्रेक्ष्य मन्द+गामिनी आगत्य गोपान् प्राह, 'भो, तृषा मे असवः उत्क्रामन्ति।'४३। ते तां ऊचुः, 'इह आरात् अम्बु अस्ति। अनया सृत्या मंदं व्रज।' सा अपि सरः गत्वा अम्बु पीत्वा तीरस्थ योषितः ऊचे।४४। 'योषितः, अत्र कः राजा मे ब्रूत। प्रजा हृष्टा भान्ति।' ता ऊचुः, 'अत्र तु वैश्यः साधुः कृती पद्माकरः राट्।'४५।

'हाय रे दैवा, कसला हा कष्टप्रद वनवास मला दाखवीत आहेस? एखाद्या हिंस्र प्राण्याच्या तोंडून मला माझ्या बाळासकट खाववीत का नाहीस? या दुःखाच्या जोखडांतून मी सुटेन तरी!' अर्थात् वाघसिंहाविषयीच्या औदार्याने ती बोलत नाही तर आपल्या असह्य शारीरिक वेदनांना कंटाळून बोलते आहे. 'मी सर्वदा असावे. माझे अस्तित्व नाही असे कधीही होऊ नये,' हे आत्म्याचे सच्चिदानंदरूपत्व सर्व प्रणिमात्र अनुभवतात. शारीरिक कष्टांना त्रासून दुःखावेशाने निघालेले हे उद्गार आहेत. पुढचे तिचे बोलणे, 'एकदाची मी या दुःखांतून सुटेन तरी!' हेच दर्शवितात.४२. असा शोक करीत करीत ती जात असताना तिला पुढे कांही गाई चरताना दिसल्या. तेव्हा हळूहळू त्या गुराख्यांकडे जाऊन म्हणाली, 'तहानेने माझे प्राण कासावीस झालेत!'४३. ते गुराखी तिला म्हणाले, 'इथे जवळच पाणी आहे. या वाटेने हळूहळू जा.' तेव्हा ती राणी त्या तळ्याकडे गेली आणि पाणी पिऊन तिथे असलेल्या स्त्रियांना म्हणाली, 'बायांनो, इथे कोण बरे राजा राज्य करतो? इथली प्रजा मला आनंदी दिसते.'४४. त्या उत्तरल्या, 'इथे पद्माकर नावाचा एक धर्मशील आणि पुण्यावान् वैश्य राजा आहे.'४५.

**अत्रान्तरेऽपि तद्दास्यः प्राप्तास्ताभिः सहाययौ । राज्ञी विट्पं पुरे दीना स तां पप्रच्छ विस्तरात् ।।४६।।**
**सा शशंसादितः सर्वं दयालुस्तां ररक्ष सः । ततः सुतोऽल्पकालेन व्रणत्रस्तोऽभ्यगान्मृतिम् ।।४७।।**
**विलपन्ती तदा तन्वी प्रेतमज्ञानतोऽब्रवीत् । त्यक्त्वा शोकार्णवे दीनां मातरं मां क्व गच्छसि ।।४८।।**
**त्वत्कृतेऽदो मया भुक्तं कष्टं तन्न स्मरस्यहो । त्वदर्थेऽन्तरिता भर्तृ-पितृमातृहितस्वकाः ।।४९।।**
**त्वदर्थं विस्मृतं दुःखं मया राट्त्यक्तयापि मे । जीवोऽसि त्वयि यातेऽहं मरिष्ये नात्र संशयः ।।५०।।**

अत्र+अन्तरे तत्+दास्यः अपि प्राप्ताः। दीना राज्ञी ताभिः सह पुरे विट्+पं आययौ। सः तां विस्तरात् पप्रच्छ।४६। सा आदितः सर्वं शशंस। सः दयालुः तां ररक्ष। ततः अल्प+कालेन व्रण+त्रस्तः सुतः मृतिं अभ्यगात्।४७। तदा विलपन्ती तन्वी अज्ञानतः प्रेतं अब्रवीत्। 'मां दीनां मातरं शोक+अर्णवे त्यक्त्वा क्व गच्छसि?४८। अहो! मया त्वत्+कृते अदः कष्टं भुक्तं तत् न स्मरसि? त्वत्+अर्थे भर्तृ+पितृ+मातृ+हित+स्वकाः अन्तरिताः। त्वत्+अर्थं राट्+त्यक्तया मया मे दुःखं अपि विस्मृतम्। जीवः असि! त्वयि याते अहं मरिष्ये अत्र न संशयः।५०।'

कांही वेळाने त्या राजाच्या दासीच तिथे आल्या. ती दीनवाणी राणी त्यांच्याबरोबरच नगरात राजाकडे आली. त्याने तिला तिची हकीकत सविस्तर विचारली.४६. तिनेही सुरुवातीपासून आपल्यावर कोसळलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. त्या दयाळू राजाने तिला आश्रय दिला. पुढे थोड्याच दिवसानी तिचा तो व्रणग्रस्त मुलगा मृत्यू पावला.४७. तेव्हा ती सुंदरी विलाप करू लागली आणि स्त्रीसुलभ मोहाने अज्ञानवश त्या प्रेतालाच बोलू लागली. 'बाळा रे, ह्या तुझ्या अनाथ आईला शोकसागरात लोटून तू कुठे जातोस?४८. तुझ्यानिमित्त मी किती कष्ट भोगले त्याची तुला कांहीच आठवण नाही का? तुझ्यामुळेच माझ्या सवतीने मला विष दिले. तुझ्याचसाठी माझी माझ्या पती, पिता, माता, मित्र आणि स्वजन यांच्यापासून ताटातूट झाली.४९. अरे बाळा, तुझ्याकडे पाहूनच मी राजाने मला टाकल्याचे दुःखही पिऊन टाकले. तू माझा प्राणच आहेस! तूच जर सोडून गेलास तरी मीही मरूनच जाणार, यात काय संशय?'५०.

**इति तद्रुदितं श्रुत्वागच्छन्हि ऋषभो मुनिः । विट्पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप करुणार्द्रधीः ॥५१॥**
**कुतो रोदिषि राज्ञीदं जगन्मायामयं ह्यसत् । भौतिके नश्वरे देहे कुतः पुत्रादिकल्पना ॥५२॥**
**कीटः कण्टकधाम्नेव यावदायुर्विचेष्टते । जीवः कर्मौघरचित-धाम्नारब्धाशनोऽवशः ॥५३॥**
**कालकर्मगुणोत्पन्नो नायं सम्बन्धलिङ्गभाक् । चिदंशः सर्वगो नित्यो देहस्त्वाद्यन्तवानचित् ॥५४॥**

इति तत्+रुदितं श्रुत्वा आगच्छन् हि करुणा+आर्द्र+धीः ऋषभः मुनिः विट्+पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप।५१। '(हे) राज्ञि कुतः रोदिषि? इदं माया+मयं जगत् असत् हि। भौतिके नश्वरे देहे पुत्र+आदि+कल्पना कुतः?'५२। 'जीवः कण्टक+धाम्ना कीटः इव यावत् आयुः कर्म+ओघ+रचित+ धाम्ना आरब्ध+अशनः अवशः विचेष्टते।'५३। 'काल+कर्म+गुण+उत्पन्नः अयं न सम्बन्ध+लिङ्ग+भाक्। चित्+अंशः सर्वगः नित्यः। देहः तु आदि+अन्त+वान् अचित्।५४।

तिचा तो विलाप ऐकून ऋषभ मुनी तिथे आले आणि त्या वैश्य राजाला भेटून त्यांनी तिची चौकशी केली. मग ते करुणासागर मुनी तिच्याकडे आले.५१. त्यांना तिच्या शोकाचे कारण कळाले असल्याने आणि हा मृत बालक आपला पूर्वजन्मीचा सेवकच आहे हे जाणून त्यांनी तिला उपदेश करायला आरंभ केला. 'राणीसाहेब, आपण का बरे रडत आहात? हे पुत्र इत्यादि जग खरे असते तर शोकाचे कारण होते. पण हे तर मायेपासून झालेले स्वप्नासारखे आभासिक आहे.' हे प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असताना भास कसा म्हणावा? त्याचे उत्तर दिले आहे, 'ह्या पांचभौतिक नश्वर देहावर पुत्र इत्यादि कल्पना कशी करतेस?'५२. (प्रश्न) 'पण ह्या भौतिक देहाच्या आश्रयानेच जन्मापसून श्मशानापर्यंत सर्व व्यवहार होतातच ना? मग पुत्रादि संबंध होतोच की!' (उत्तर) जसा एखादा किडा आपल्या शरीरावर काटेरी कोष करतो आणि त्यात विविध चेष्टा करतो तसाच जीव आपल्या पूर्वार्जित कर्मापासून झालेल्या देहाने आपल्या प्रारब्धाचा विवशतेने भोग घेतो. तो देहाहून वेगळाच असतो.५३. 'त्या जीवाचे निमित्त कारण कर्म आहे, सत्त्व, रज, तम हे गुण त्याचे उपादान कारण आहेत आणि कर्म पिकण्यासाठी आवश्यक काल हा क्षोभक आहे. त्या जीवाला न पुत्रादि..

**कोऽपि शुग्विषयो नातो धृतिमास्थाय सात्त्विकीम् । भज प्रारब्धमश्नन्ती यावदायुः परेश्वरम् ।।५५।।**
**एतावदृषभः प्रोक्त्वा विरराम तदा तु सा । अबोधविक्लवा प्राह प्रणताश्रूत्तलोचना ।।५६।।**
**भवताऽध्यात्मतत्त्वं मे प्रोक्तं कारुणिकेन सत् । सदा परिचितोऽबोधः स्थेयं नैतेन तन्मयि ।।५७।।**

कः अपि शुक्+विषयः न। अतः सात्त्विकीं धृतिं आस्थाय यावत् आयुः प्रारब्धं अश्नंन्ती पर+ईश्वरं भज।५५।' ऋषभः एतावत् प्रोक्त्वा विरराम। तदा सा तु अबोध+विक्लवा प्रणता अश्रु+उत्त+लोचना प्राह।५६। 'कारुणिकेन भवता मे अध्यात्म+तत्त्वं सत् प्रोक्तम्। अबोधः सदा परिचितः, एतेन तत् मयि न स्थेयम्।'५७।

..संबंध आहेत न स्त्रीपुरुषलिंग आहे. तो चैतन्याचा अंश असल्याने सर्वव्यापी आहे. अशा ह्या नित्य शाश्वत जीवाला अंतच नाही. मग त्याचा शोक का म्हणून करायचा? देह तर बोलूनचालून आदि आणि अंत असलेली जड वस्तू आहे. तिचाही शोक करणे व्यर्थ आहे.'५४. 'याप्रमाणे, हे राणी, शोकाचे कांही कारणच नाही. तरी सात्त्विक धैर्याचा अवलंब करून जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत प्रारब्ध भोगीत परमेश्वराची भक्ती कर!'५५.

ऋषभदेव एवढे बोलून थांबले. तेव्हा अज्ञानाने बधीर झालेली राणी, मुनींपुढे नम्र होऊन पाणावलेल्या डोळ्यांनी म्हणाली, 'आपण मोठ्या कळवळ्याने मला हे समीचीन दुर्लभ अध्यात्मज्ञान सांगितले खरे! पण सतत अज्ञानाच्याच छायेत असणाऱ्या माझ्या मनात ते स्थिरावत नाही.' कठोपनिषदांत (१:२:७) म्हटलेच आहे, 'अनेकांना ते (आत्मतत्त्व) ऐकूनही कळत नाही.'५७.

**येन मे सुप्रसन्नं स्यान् मनस्तद्धि विधीयताम् । ईशेन प्रेरितो दुःख-दशायामपि मे भवान् ।।५८।।**
**स तच्छ्रुत्वा सकारुण्यं बालं ज्ञात्वा स्वसेवकम् । प्रसन्नोऽभूत्स नत्यैव फलन्त्यत्र हि साधवः ।।५९।।**
**तपउज्वलितात्मा स साक्षाच्छम्भुरिवापरः । चिक्षेप भस्म तद्गात्रे स सुप्तोत्थितवत्स्थितः ।।६०।।**
**दत्वासिं शैवकवचं नागायुतबलं मुनिः । भूयादजेयो भद्रायू राजशास्तेत्युवाच सः ।।६१।।**

'येन मे मनः सुप्रसन्नं स्यात् तत् हि (भवता) विधीयताम्। मे दुःख+दशायां अपि भवान् ईश्वरेण प्रेरितः।'५८। सः तत् स+कारुण्यं श्रुत्वा बालं स्व+सेवकं ज्ञात्वा सः प्रसन्नः अभूत्। अत्र साधवः नत्या एव हि फलन्ति।५९। तप+उज्वलित+आत्मा साक्षात् अपरः शम्भुः इव तत्+गात्रे भस्म चिक्षेप। सः सुप्त+उत्थितवत् स्थितः।६०। मुनिः असिं शैव+कवचं (तथा) नाग+अयुत+बलं दत्वा सः उवाच, 'अजेयः भद्र+आयुः राज+शास्ता भूयात्' इति उवाच।६१।

'ज्यायोगे माझे मन सुप्रसन्न होईल असेच आपण करावे. मन प्रसन्न झाले की सर्व दुःखांचा नाश होतो (भ.गीता २:६५) माझ्या ह्या दुःखावस्थेत आपल्याला ईश्वरानेच पाठविले आहे!'५८. ते ऋषभदेव तिचे ते काकुळतीचे बोलणे ऐकून आणि तो बालक आपला सेवक आहे हे जाणून प्रसन्न झाले. खरोखर या भूतलावर साधू केवळ प्रणामानेच फलदायी होतात. (अर्थांतरन्यास) आश्वलायन गृह्यसूत्रानुसार (१:१:५) 'देवता नमस्काराचे उल्लंघन करीत नाहीत.'५९. तपाने अंतर्बाह्य तेजस्वी असे ते साक्षात् शंकरच जणू होते. त्यांनी त्या बालकाच्या शरीराच्या सर्व भागांवर भस्म प्रोक्षण केले. त्याबरोबर तो बालक झोपेतून जागल्यासारखा उठून बसला.६०.

ऋषभ मुनींनी त्याला खड्ग, शैव कवच आणि दहा हजार हत्तींचे बळ दिले आणि 'तूं अजिंक्य, दीर्घायुषी आणि राजाला शासन करणारा होशील' असा आशीर्वाद दिला. इथे श्रीस्वामिमहाराजांनी स्कंद पुराणांतील (ब्रह्मोत्तर खंड १२:३५:४२) पुढील श्लोक उद्धृत केले आहेत. '*पुनश्च भस्म संमंत्र्य तदङ्गं परितोऽस्पृशत्। खड्गशङ्खाविमौ दिव्यौ परसैन्यविनाशिनौ।। आत्मसैन्यस्वपक्षाणां शौर्यतेजविवर्धनौ। एतयोश्च प्रसादेन शैवेन कवचेन च।। द्विषट्सहस्रनागानां बलेन महतापि च। भस्मधारणसामर्थ्याच्छत्रुसैन्यं विजेष्यति।। प्राप्य सिंहासनं पित्र्यं गोप्ताऽस्ति पृथिवीमिमाम्।।*'६१.

**तदा माता सुतोऽपि द्राग् दिव्यगात्रौ बभूवतुः । एतावान् साधुमहिमा तस्मात्तं शरणं व्रज ।।६२।।**

**।। राजोवाच ।।**

**साधु श्राव्यं त्वया प्रोक्तं सन्माहात्म्यं द्विजोत्तम । क्वास्त एतादृशः साधुस्तन्मे कथय भूसुर ।।६३।।**
**म्लेच्छोऽयं कथमस्मै तत्कथनीयमिति प्रिय । न मन्तव्यं हि दासोऽहं ब्राह्मणानां विशुद्धधीः ।।६४।।**

**।। विप्र उवाच ।।**

**मया तु भीमामरजा-सङ्गमे कश्चनास्ति सन् । साक्षात् परेश्वर इव श्रुतस्तं शरणं व्रज ।।६५।।**

'तदा माता, सुतः अपि दिव्य+गात्रौ बभूवतुः। एतावान् साधु+महिमा! तस्मात् तं शरणां व्रज।'६२। राजा उवाच। '(हे) द्विज+उत्तम, त्वया श्राव्यं सत्+माहात्म्यं साधु प्रोक्तम्। (हे) भू+सुर, एतादृशः साधुः क्व आस्ते, मे कथय।'६३। '(हे) प्रिय, अयं म्लेच्छः अस्मै कथं कथनीयं इति न मन्तव्यम्। अहं विशुद्ध+धीः, ब्राह्मणानां दासः।'६४। विप्र उवाच। 'मया तु श्रुतं, भीमा+अमरजा+सङ्गमे कश्चन पर+ईश्वर इव अस्ति। तं शरणं व्रज।'६५।

तेव्हा लगेच त्या मायलेकांची शरीरे व्रणरहित आणि दिव्य झाली. 'राजेसाहेब, असा हा संतांचा महिमा आहे. तेव्हा तुम्ही त्यांना शरण जा.'६२. राजाने विचारले, 'ब्रह्मश्री, आपण हे श्रवणीय असे साधूंचे माहात्म्य छान सांगितलेत. असा संतश्रेष्ठ मला कुठे भेटेल ते मला सांगा.'६३. 'हा मुसलमान आहे, ह्याला कसे सांगावे?' असा विचार कृपया मनात आणू नका. मी शुद्ध बुद्धीने विचारीत आहे आणि मी ब्राह्मणांचा सेवक आहे!'. त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'भीमा-अमरजा संगमावर असा कुणी एक परमेश्वरस्वरूप महात्मा आहे, असे माझ्या ऐकण्यात आले आहे. तुम्ही त्यांना शरण जा!'६५.

**तच्छ्रुत्वा सत्वरं राज्यमेत्य राजा बलान्वितः । प्रतस्थे स्वासनारूढः साधुसंदर्शनाय सः ॥६६॥**
**गन्धर्वपुरमासाद्य पौरान् पप्रच्छ कश्चन । आस्तेऽत्र तापसस्तं मे भवन्तो दर्शयन्त्वरम् ॥६७॥**
**म्लेच्छान्दृष्ट्वापि ते भीता नोचुः क्रुद्धोऽब्रवीन्नृपः । तद्दर्शनायागतोऽस्मि कुत्रास्ते स तु कथ्यताम् ॥६८॥**
**तदोचुः सङ्गमेऽस्तीति तच्छ्रुत्वा सत्वरं नृपः । पादचारी नदीं गत्वा ददर्श श्रीगुरुं परम् ॥६९॥**
**तमपि प्रेक्ष्य भगवान् प्राह रे रजकानुग । कुत्र तिष्ठसि कच्चित्त्वं क्षेमी नेहागतः कुतः ॥७०॥**

तत् श्रुत्वा सः राजा सत्वरं राज्यं एत्य बलान्वितः स्वासन+आरूढः साधु+संदर्शनाय प्रतस्थे।६६। गन्धर्वपुरं आसाद्य पौरान् पप्रच्छ, 'अत्र कश्चन तापसः आस्ते। भवन्तः तं मे अरं दर्शयन्तु।'६७। ते म्लेच्छान् दृष्ट्वा भीताः न ऊचुः। नृपः क्रुद्धः अब्रवीत्। 'तत्+दर्शनाय आगतः अस्मि। सः तु कुत्र आस्ते कथ्यताम्।'६८। तदा (ते) ऊचुः, 'सङ्गमे अस्ति' इति। तत् श्रुत्वा नृपः सत्वरं पादचारी गत्वा परं गुरुं ददर्श।६९। भगवान् अपि तं प्रेक्ष्य प्राह, 'रे रजक, अनुग, कुत्र तिष्ठसि? कच्चित् त्वं क्षेमी? कुतः इह न आगतः?'७०।

त्या ब्राह्मणाच्या सांगण्यानुसार तो राजा लगेच घाईने बिदरला आला आणि आपल्या पालखीत बसून सैन्यासह संतदर्शनासाठी गाणगापूरला निघाला.६६. तिथे येऊन त्याने तिथल्या लोकांना विचारले, 'इथे कुणी तपस्वी महात्मे राहतात; ते कुठे आहेत ते मला लवकर दाखवा!'६७. नगरवासी त्या सगळ्या मुसलमानांना पाहून घाबरून कांहीच बोलेनात. त्यावर राजा चिडून म्हणाला, 'अहो, मी त्यांच्या दर्शनासाठी आलो आहे. ते कुठे आहेत ते सांगा ना!'६८. मग त्यांनी त्याला सांगितले की 'स्वामी संगमावर आहेत.' ते ऐकताच राजा पालखीतून उतरला आणि लगबगीने पायीच चालत नदीवर जाऊन त्याने त्या परमश्रेष्ठ श्रीगुरूंचे दर्शन घेतले.६९. त्याला पाहताच श्रीगुरू म्हणाले, 'अरे माझ्या भक्ता रजका, कुठे असतोस? तू सकुशल आहेस ना? इतके दिवस का आला नाहीस? मला सांग!'७०.

**तच्छ्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्धप्राक्स्मृतिरब्रवीत् । त्वद्दत्तराज्यसक्तेन तवाङ्घ्री विस्मृतौ मया ।।७१।।**
**योऽहं प्राग्रजकः सार्व-भौमः सोऽभवमीदृशी । त्वत्कृपा सत्यसङ्कल्प मम मन्तून् क्षमस्व भोः ।।७२।।**
**श्रीपाद रजकं कृष्णा-विहारे पाहि मानुगम् । लोलन्मस्तकबाह्वङ्घ्रि गलद्धर्षाश्रुमानतम् ।।७३।।**
**स्फोटकार्तिनिमित्तेन लब्धं ते दर्शनं हरे । अन्तर्गतापि संविन्मे लब्धैतर्हि निमेषतः ।।७४।।**

तत् श्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्ध+प्राक्+स्मृतिः अब्रवीत्। 'मया त्वत्+दत्त+राज्य+सक्तेन तव अङ्घ्री विस्मृतौ।'७१। '(हे) सत्य+सङ्कल्प, यः अहं प्राक् रजकः सः सार्वभौमः अभवम् ! ईदृशी त्वत्+कृपा। भोः मम मन्तून् क्षमस्व।'७२। '(हे) कृष्णा+विहारे श्रीपाद, लोलन्+मस्तक+बाहु+अङ्घ्रि गलत्+हर्षाश्रुं, आनतम् मां अनुगं पाहि।'७३। '(हे) हरे, स्फोटक+आर्ति+निमित्तेन ते दर्शनं लब्धम्। मे संवित् अन्तः+गता अपि एतर्हि निमेषतः लब्धा।'७४।

श्रीगुरूंचे वचन कानांवर पडताच राजाची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि हेच आपले गुरू श्रीपाद आहेत हे जाणून तो म्हणाला,(७१) 'आपणच दिलेल्या राज्यात आसक्त होऊन मी आपले चरण विसरून की हो गेलो!' 'असं का? मग सांग बरे मी कोण आहे?' असा श्रीगुरूंचा प्रश्न अपेक्षून तो राजा पुढच्या तीन श्लोकांत सांगतो आहे.(७२) 'प्रभो, आपले वचन कधीच मिथ्या होत नाही! पूर्वजन्मी मी जो परीट होतो तोच आता हा सार्वभौम राजा झालो आहे. असा आपला कृपाप्रभाव आहे! महाराज, माझ्या अपराधांची क्षमा करा.'७२. 'कृष्णातीरी रमणाऱ्या श्रीपादगुरो, हात, पाय आणि मस्तक थरथरत असताना, डोळ्यांतून हर्षाश्रू गाळीत आपल्यासमोर वाकलेल्या आपल्या सेवकाचे रक्षण करा!' सर्वांगाचा कंप आणि सात्त्विक भावांचा उद्रेक यातून राजावर शक्तिपात झाल्याचे संकेत मिळतात.७३. 'हरे, या स्फोटकाच्या दुखण्याच्या निमित्ताने आज आपले दर्शन झाले आणि माझी हरवलेली जाणीवही आत्ता एका क्षणात परतली!'७४.

**स्फोटकं दर्शय क्वास्त इत्युक्तो गुरुणा स तु । सन्तं स्फोटकमप्यङ्के न दृष्ट्वा चकितोऽब्रवीत् ॥७५॥**
**स्वामिन्मन्येऽनुगोऽयं ते स्फोटकोऽनयवर्तिनम् । आनीय दण्ड्यमन्यत्र कृतकार्यो ययौ खलु ॥७६॥**
**तव जाग्रत्सु वाक्येषु दुःखदोषपरिप्लुते । असारे सति संसारे मग्नं माज्ञं समुद्धर ॥७७॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**तृप्तं तेऽपि मनो भोगैर् भुक्तं राज्यमपीप्सितम् । लब्धाः पुत्रादयो वापि का वापेक्षास्ति ते वद ॥७८॥**

गुरुणा, 'स्फोटकं क्व अस्ति, दर्शय!' इति उक्तः सः तु अङ्के सन्तं स्फोटकं अपि न दृष्ट्वा चकितः अब्रवीत्।७५। '(हे) स्वामिन्, अयं स्फोटकः ते अनुगः मन्ये। अनय+वर्तिनं दण्ड्यं (मां) आनीय कृत+कार्यः अन्यत्र ययौ खलु।७७। तव जाग्रत्सु वाक्येषु दुःख+दोष+परिप्लुते असारे संसारे मग्नं मां अज्ञं समुद्धर।'७७। श्रीगुरुः उवाच। 'ते मनं भोगैः तृप्तम्? अभीप्सितं राज्यं अपि भुक्तम्? पुत्र+आदयः अपि लब्धाः वा? का वा अपेक्षा अस्ति? वद।'७८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुला स्फोटक झाला आहे का? दाखव पाहू कुठे आहे?' तेव्हा राजाने पाहिले मांडीवर असलेला तो फोड नाहीसाच झाला आहे! तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.७५. 'स्वामिमहाराज, हा स्फोटक तुमचाच दूत असावा. अन्यायाने वागणाऱ्या, शिक्षापात्र अशा मला इथे आणून, आपले काम होताच इतरत्र निघून गेला वाटते!'७६. 'महाराज, पूर्वजन्मी आपल्या जाग्रत वचनांचा उपदेश असूनही मी या दुःखदोषांनी बरबटलेल्या सारहीन संसारात निमग्न झालो आहे. आपणच माझा यातून उद्धार करा.'७७. श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुझे मन भोगांनी तृप्त झाले का? तुला ज्याची तीव्र कामना होती ते राज्य भोगून झाले ना? पुत्रादि सर्व लाभले ना? का आणखी कांही अपेक्षा आहे, मला सांग.'७८.

**स प्राह परिपूर्णं मे सर्वं ते कृपयेश्वर । त्वद्दत्ताप्यखिला ते श्रीरर्पणीयेत्यपेक्षितम् ।।७९।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यतेर्मे गमनं म्लेच्छ गोघ्ने राज्ये कथं भवेत् । मां वर्णास्त्वामपि म्लेच्छ हसिष्यन्ति न संशयः ।।८०।।**

**।। राजोवाच ।।**

**रजकोऽहं भवान्छ्रीपान् न हिंसातःपरं पुरे । इत्युक्त्वा लोलदङ्गस्तं नेतुकामोऽस्तुवद्विभुम् ।।८१।।**

सः प्राह, '(हे) ईश्वर, ते कृपया मे सर्वं परिपूर्णम्। त्वत्+दत्ता अखिला श्रीः अर्पणीया इति अपेक्षितम्।'७९। श्रीगुरुः उवाच। 'रे म्लेच्छ, मे यतेः गो+घ्ने राज्ये गमनं कथं भवेत्? मां वर्णाः त्वां अपि म्लेच्छाः हसिष्यन्ति न संशयः।'८०। राजा उवाच। 'अहं रजकः, भवान् श्रीपादः। अतःपरं पुरे हिंसा न।' इति उक्त्वा लोलत्+अङ्गः तं नेतु+कामः विभुं अस्तुवत्।८१।

तो यवन राजा उत्तरला, 'महाराज, आपल्या कृपेने माझे सर्व कांही परिपूर्ण झाले आहे. आता आपण दिलेले हे सर्व ऐश्वर्य आपल्याला समर्पित करावे हीच एक इच्छा आहे!'७९. श्रीगुरू म्हणाले, 'अरे यवना, माझ्यासारख्या संन्याशाला, जिथे नित्य गोहत्या होते त्या राज्यात कसे बरे जाता येईल? मला वर्णाश्रमधर्माचे लोक (हिंदू), आणि तुलाही सगळे मुसलमान निःसंशय हसतील की!' इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी '**गो** म्हणजे वेदांची विधिवचने (आज्ञा) यांची हत्या म्हणजे नास्तिक्याने अवज्ञा होते अशा तुझ्या राज्यात मी संन्यासी कसा येऊ?' असा पर्यायी अर्थ दिला आहे.८०. राजा म्हणाला, 'मी जरी सांप्रत जातीने मुसलमान असलो तरी पूर्वजन्माची स्मृती आल्याने आपण श्रीपादस्वामी आहात आणि मी आपला सेवक रजक आहे. याउप्पर माझ्या नगरीत गोहिंसा होणार नाही.' असे बोलून कापऱ्या शरीराने श्रीप्रभूंना आपल्या राज्याला नेण्याच्या इच्छेने तो त्यांची स्तुती करू लागला.८१.

**स प्राह तुष्ट आयास्ये भक्ताधीनोऽस्मि केवलम् । हेतुनानेन नोपेक्ष्या मद्भक्ता मद्गतान्तराः ।।८२।।**
**स तच्छ्रुत्वोपवेश्येशं प्रतीतः स्वासने नृपः । वाहान्दत्वापि शिष्येभ्यो धृततत्पादुकोऽन्वगात् ।।८३।।**
**प्राहाङ्घ्रिचारिणं स्वामी तं तदारादितो नृप । गन्तव्यमस्त्यपीदं तु न श्लाघ्यं सार्वभौम ते ।।८४।।**
**स प्राह सार्वभौमः को रजकस्तेऽनुगोऽस्म्यहम् । त्वयैव न्यस्तभूधूस्त आज्ञयानुचराम्यहम् ।।८५।।**

तुष्टः सः प्राह, 'आयास्ये। केवलं भक्त+अधीनः अस्मि। अनेन हेतुना मत्+गत+अन्तराः मत्+भक्ताः न उपेक्ष्याः।'८२। सः प्रतीतः नृपः तत् श्रुत्वा ईशं स्व+आसने उपवेश्य, शिष्येभ्यः अपि वाहान् दत्वा धृत+तत्+पादुकः अन्वगात्।८३। तत् तं अङ्घ्रि+चारिणं स्वामी प्राह, 'इतः आरात् गन्तव्यं अस्ति। (हे) सार्वभौम, इदं अपि तु ते न श्लाघ्यम्।'८४। सः प्राह, 'कः सार्वभौमः? अहं ते अनुगः रजकः अस्मि। त्वया एव न्यस्त+भू+धूः अहं ते आज्ञया चरामि।'८५।

त्याने प्रसन्न होऊन श्रीपाद त्याला म्हणाले, 'बरे तर, येतो मी! मी केवळ भक्तपराधीन आहे. त्याकरिता ज्यांनी आपल्या चित्तांत मला धरून ठेवले आहे अशा माझ्या भक्तांची उपेक्षा करू नये.'८२. राजाला आनंद वाटला. त्याने लगेच श्रीगुरूंना आपल्या पालखीत बसविले, त्यांच्या शिष्यांनाही वाहने दिली आपण श्रीगुरूंच्या पादुका हातात घेऊन तो पायीच त्यांच्या मागे निघाला.८३. त्याला तसे पायी चालतांना पाहून स्वामी म्हणाले, 'आपल्याला इथून बरेच दूर जायचे आहे. तुझ्यासारख्या सार्वभौम राजाला हे असे पायी चालणे शोभत नाही.' ८४. तो राजा म्हणाला, 'कोण सार्वभौम राजा? महाराज! मी तर आपला दास रजक आहे. आपणच माझ्या खांद्यावर दिलेली हा राज्याची धुरा मी वाहतो आहे आणि आपल्याच आज्ञेत राहतो आहे.'८५.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**दत्तं ते दिक्पमात्राभी राट्त्वं तेनासि विष्णुवत् । राजन्ममाज्ञयैवाश्वमारुह्य व्रज मा वद ॥८६॥**
**ततः सोऽप्यारुरोहाश्वं तमाह भगवान्नृप । गत्यानया क्रियालोपो भवेदग्रे व्रजाम्यतः ॥८७॥**
**एहि मन्दं पापनाश-तीर्थे तिष्ठामि भूपते । इत्युक्त्वार्धक्षणात् पङ्क्ति-योजनायतमापतत् ॥८८॥**
**सशिष्यः स तु तत्तीर्थे सान्ध्यं कर्माकरोत्तदा । सायंदेवसुतो नाग-नाथो गच्छन् ददर्श तम् ॥८९॥**

श्रीगुरुः उवाच। '(हे) राजन्, ते दिक्+प+मात्राभिः राट्+त्वं दत्तम्। तेन (त्वं) विष्णु+वत् असि। मम आज्ञया एव अश्वं आरुह्य व्रज। मा वद।'८६। ततः सः अपि अश्वं आरुरोह। भगवान् तं आह, 'अनया गत्या क्रिया+लोपः भवेत्। अतः अग्रे व्रजामि।'८७। 'भूपते, मन्दं एहि। पापनाश+तीर्थे तिष्ठामि।' इति उक्त्वा अर्ध+क्षणात् पंक्ति+योजन+आयतं आपतत्।८८। तत् सः तु सशिष्यः सांध्यं कर्मं अकरोत्। तदा सायंदेव+सुतः नागनाथः गच्छन् तं ददर्श।८९।

**हीन यातीचा राजाही आदरणीय.** श्रीगुरु त्याला म्हणाले, 'अरे राजा, मी तुला दिक्पालांच्या अंशापासून राजेपण दिलेले आहे. त्यामुळे तू विष्णुसमान आहेस. तरी माझी आज्ञा म्हणूनच तू आता कांही न बोलता घोड्यावर स्वार हो.' ह्यातून असे सूचित केले आहे की युगमानाने जरी राजा हीन जातीचा असला तरी त्याचा आदर केला पाहिजे आणि त्याच्या शासनाचे अतिक्रमण करू नये.८६. मग तो राजाही घोड्यावर बसला. त्याला श्रीगुरू भगवान् म्हणाले, 'ह्या मंद गतीने गेल्यास माझ्या नित्यकर्माचा लोप होईल. त्यासाठी मी पुढे जातो.'८७. 'आणि राजा, तू सावकाश ये. मी पापनाशतीर्थावर थांबतो.' एवढे बोलून श्रीगुरू क्षणार्धांत दहा योजन (४० कोस किंवा १०० मैल) दूर बिदरजवळील पापनाश तीर्थाला पोचले (गाणगापूरहून बिदर ११० कि.मी. आहे).८८. तिथे श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांसह संध्याकाळचे कर्म केले. तेवढ्यात सायंदेवाचा वडील मुलगा नागनाथाने तिथे येऊन श्रीगुरूंचे दर्शन घेतले.८९.

**चकोरश्चन्द्रमिव तं दृष्ट्वा हृष्टः स्वदैवतम् । संप्रार्थ्य स्वगृहं नीत्वा भोजयामास सादरम् ।।९०।।**
**सशिष्यस्तद्गृहे भुक्त्वा तमाहैष्यति राडिह । स तु म्लेच्छो न साध्वेतत्तीर्थे स्थेयमतो द्विज ।।९१।।**
**इत्युक्त्वा स ययौ तीर्थं स राजाप्याययौ तदा । प्रतीतः पादचारी स निन्ये निजपुरं गुरुम् ।।९२।।**
**अलङ्कृतं शुभं नाना-रत्नतोरणमण्डितम् । पताकाध्वजसङ्कीर्णं पुरं भास्वत्सुशोभनम् ।।९३।।**
**गीतवाद्यजयध्वान-सङ्कुलं शिष्ययुग्गुरुः । नीराजितो रत्नदीपैः पालकस्थो विवेश सः ।।९४।।**

तं स्व+दैवतं चकोरः चन्द्रं इव दृष्ट्वा हृष्टः संप्रार्थ्य स्व+गृहं नीत्वा सादरं भोजयामास।९०। (श्रीगुरुः) सशिष्यः तत्+गृहे भुक्त्वा तं आह, 'राट् इह एष्यति। स तु म्लेच्छः। न एतत् साधु। अतः (हे) द्विज, तीर्थे स्थेयम्।'९१। इति उक्त्वा सः तीर्थं ययौ। तदा सः राजा अपि आययौ। सः प्रतीतः पादचारी गुरुं निज+पुरं निन्ये।९२। अलङ्कृतं शुभं नाना+रत्न+तोरण+मण्डितं पताका+ध्वज+सङ्कीर्णं सुशोभनं भास्वत् गीत+वाद्य+जय+ध्वान+सङ्कुल सः पालक+स्थः शिष्ययुक् गुरुः पुरं रत्न+दीपैः नीराजितं विवेश।९३-९४।

आपले दैवतच असलेल्या श्रीगुरूंना पाहून चकोराला चंद्रदर्शनाने व्हावा तसा आनंद त्याला झाला. या दृष्टांताने त्याला गुरुदर्शनाची किती ओढ होती ते दाखविले आहे. त्याने आग्रहाची प्रार्थना करून सर्वांना आपल्या घरी नेऊन आदरपूर्वक भोजन दिले.९०. शिष्यांसह नागनाथाच्या घरी भोजन घेतल्यावर श्रीगुरू त्याला म्हणाले, 'भटजी, आता थोड्याच वेळात राजा इथे येईल. तो तर तुला मुसलमान आहे. ते कांही बरे नाही. तरी आम्ही तीर्थावरच थांबतो.'९१. असे म्हणून ते तीर्थाला गेले. तितक्यात राजाही येऊन पोचला. श्रीगुरूंना पाहून त्याला आनंद झाला. स्वतः पायी चालत त्याने श्रीगुरूंना पालखीत बसवून आपल्या नगरीत नेले.९२. संपूर्ण शहर नाना रत्नांची तोरणे, पताका, ध्वज, यांनी शृंगारले होते. त्या सुशोभित, सुप्रकाशित आणि शुभालंकृत शहरात गीत, वाद्य आणि जयजयकारच्या गजरात, पालखीत बसून श्रीगुरूंनी शिष्यांसह प्रवेश केला. त्या वेळी त्यांना रत्नदीपांनी ओवाळण्यांत आले.९३-९४.

**पट्टकूलच्छत्रसृत्या नीत्वान्तःपुरमीश्वरम् । भद्रासने तूपवेश्य पूजयामास तं नृपः ।।९५।।**
**शिष्यान् यथास्वपीठस्थान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः । पुत्रान्पौत्रान्सखीन्स्वांश्च दर्शयामास शंभवे ।।९६।।**
**गीतं सवाद्यं नृत्यं च छत्रचामरमालिने । तस्मै समर्प्य प्रकृतीर् दर्शयामास सर्वशः ।।९७।।**
**म्लेच्छा विरुद्धचेष्टं धिक्-चक्रुर्भूपं द्विजार्चकम् । प्रशशंसुर्द्विजा राजा पुण्यश्लोकोऽयमित्यपि ।।९८।।**
**गुरुस्तमाह हृष्टोऽस्मि दृष्ट्वा ते प्रकृतीः शुभाः । तुष्टोऽस्याभिर्न वा ब्रूहि निःशङ्कं निकटं मम ।।९९।।**

पट्टकूल+छन्न+सृत्या अन्तःपुरं नीत्वा तु भद्र+आसने उपविश्य नृपः तं पूजयामास।९५। यथा+स्वपीठान् शिष्यान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः पुत्रान् पौत्रान् सखीन् स्वां च शंभवे दर्शयामास।९६। सवाद्यं गीतं नृत्यं च छत्र+चामर+मालिने तस्मै सर्वशः प्रकृतीः समर्प्य दर्शयामास।९७। म्लेच्छा विरुद्ध+चेष्टं द्विज+अर्चकं भूपं धिक् चक्रुः। द्विजाः 'अयं राजा पुण्य+श्लोकः' इति अपि प्रशशंसुः।९८। गुरुः तं आह, 'अस्याभिः तुष्टः असि? न वा? मम निकटं निःशंकं ब्रूहि।'९९।

राजाने त्यांना गालिच्यांनी मढवलेल्या मार्गाने अंतःपुरांत नेऊन सिंहासनावर बसवून राजोपचारांनी सत्कार केला.९५. शिष्यांनाही आपापल्या योग्यतेप्रमाणे आसने देऊन त्यांची उत्तम प्रकारे पूजा केली. मग राजाने आपल्या पट्टराण्या, इतर स्त्रिया, मुले, नातवंडे, मित्र, मैत्रिणी, स्वजन सर्वांना श्रीगुरूंना भेटविले.९६. श्रीगुरूंवर छत्र धरून व त्यांच्यावर चवऱ्या ढाळत त्यांना आपल्या सर्व मंत्री, सुहृद, कोश, सैन्य सन्माननीय पौर इत्यादि सर्व प्रकृती (वैभव) दाखविल्या. (*स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च। सेनाङ्गानि प्रकृतयः पौराणां श्रेणयोऽपि च।।* अमरकोश २:८:१७-१८).९७. त्या वेळी मुसलमान लोक ह्या ब्राह्मणांची पूजा करणाऱ्या धर्मविरुद्ध वागणाऱ्या राजाचा धिक्कार करू लागले. ब्राह्मण मात्र 'हा राजा पुण्यश्लोक आहे!' अशी त्याची भलाई करू लागले.९८.

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'या सगळ्या वैभवाने तू संतुष्ट आहेस ना? की नाहीस? मला निःशंकपणे सांग.'९९.

**स प्राहाभिर्न तुष्टोऽस्मि साम्राज्यं तेऽङ्घ्रिसंस्थितम् ।श्रुत्वा तत्परमं काङ्क्षे दुरापमपि देहि मे ।।१००।।**
**अद्यैव भवते कुर्वे सर्वस्वात्मनिवेदनम् । इत्युक्त्वा स तथा चक्रे राट् सङ्कल्पपुरःसरम् ।।१०१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कृतं साधु त्वया भूप तुष्टोऽनेन ददामि ते । मन्मनस्काय भक्ताय शुद्धभावाय काङ्क्षितम् ।।१०२।।**

सः प्राह, 'न तुष्टः अस्मि। ते अङ्घ्रि+संस्थितं साम्राज्यं श्रुत्वा तत् परमं काङ्क्षे। दुरापं अपि मे देहि।'१००। 'अद्य एव भवते सर्वस्व+आत्म+निवेदनं कुर्वे।' इति उक्त्वा राट् सङ्कल्प+पुरःसरं तथा चक्रे।१०१। श्रीगुरुः उवाच। '(हे) भूप, त्वया साधु कृतम्। अनेन तुष्टः मत्+मनस्काय भक्ताय शुद्ध+भावाय ते कांक्षितं ददामि।१०२।'

तेव्हा तो राजा उत्तरला, 'नाही महाराज! मी याने समाधानी नाही. आपल्या चरणसेवारूप साम्राज्याची मला आस आहे. कितीही दुष्प्राप्य असेल तरी ते मला द्या!'१००. 'सर्वस्वाचे आणि आपले समर्पण केल्यावाचून आपली चरणसेवा दुर्लभ असेल तर आजच मी माझे राज्यादि सर्वस्व आणि हा देह या सर्वांचे निवेदन करतो.' असे बोलून राजाने '*अनेन विश्वात्मा प्रसीदतु*' असा संकल्प करून मनःपूर्वक सर्वस्वात्मनिवेदन केले.१०१.

**भक्ताची जातपात पाहू नये.** श्रीगुरू म्हणाले, 'राजा, तूं हे मोठे सत्कार्य केलेस! ह्या आत्मसमर्पणाने माझ्या सर्वात्मकाच्या ठिकाणी तुझी वृत्ती अनन्य झाली आहे. आता तुला तुझी वांछित चरणसेवा देतो!' नीच यातीच्या मुसलमानाला कशी चरणसेवा दिली? या प्रश्नाचे उत्तर **'शुद्धभावाय भक्ताय'** या विशेषणात आहे. रागादि मल चित्तांतून गेल्याने त्या राजाचा (स्व)भाव शुद्ध झाला होता. '*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्*'।।९:३२।। या गीतावचनानुसार भगवंताच्या भक्तांसाठी वर्णादींचे प्रयोजन नाही. भक्तीच्या उत्पत्तीसाठी आपल्या वर्णाश्रमानुसार विहित कर्माचे अनुष्ठान करून चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. पण पूर्वजन्माच्या कांही संस्कारांनी जागलेल्या भक्तीचा कोणाला नाश करता येईल? तो राजा यवन असला तरी त्याच्या पूर्वसंस्कारांनी त्याच्या चित्तात भक्तीचा उदय झाला आहे. त्याच्या जातपातीमुळे तिला बाध येऊ शकत नाही. म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपली चरणसेवा दिली यावर कांहीही आक्षेप घेता येत नाही.१०२.

**इत्युक्त्वा श्रीगुरुर्यूने भूधुरं पार्थिवार्पिताम् । ज्येष्ठायादाद्विनीताय तदौरससुताय सः ।।१०३।।**
**भूपं प्राह गुरुः शीघ्रं प्रव्रजाहमितो द्रुतम् । गत्वा मठं समाश्वास्य शिष्यान्भक्तानपीतरान् ।।१०४।।**
**श्रीपर्वतं गमिष्यामि त्वमप्येहि नगोत्तमे । भवेन्मे दर्शनं तत्र जीवन्मुक्तो भविष्यसि ।।१०५।।**
**इत्युक्त्वा गौतमीं गत्वा स्नात्वा शिष्यान्वितः प्रभुः । संप्राप्तोऽमरजाभीमा-सङ्गमं योगिजीवनः ।।१०६।।**

इति उक्त्वा सः श्रीगुरुः पार्थिव+अर्पितं भूधुरं यूने, ज्येष्ठाय विनीताय तत्+औरस+सुताय अदात्।१०३। गुरुः भूपं प्राह, 'शीघ्रं प्रव्रज। अहं इतः द्रुतं मठं गत्वा, शिष्यान्, भक्तान् इतरान् अपि समाश्वास्य।१०४। श्रीपर्वतं गमिष्यामि। त्वं अपि नग+उत्तमे एहि। तत्र मे दर्शनं भवेत्। (त्वं) जीवन्+मुक्तः भविष्यसि।१०५।' इति उक्त्वा शिष्य+अन्वितः योगिजीवनः प्रभुः गौतमीं गत्वा स्नात्वा अमरजा+भीमा+सङ्गमं संप्राप्तः।१०६।

असे त्या राजाशी बोलून श्रीगुरूंनी त्याने अर्पण केलेली राज्यधुरा कामंदकाच्या वचनानुसार (*विनीतमौरसं पुत्रं यौवराज्येऽभिषेचयेत्।* २:६-७) त्याच्या तरुण, ज्येष्ठ, विनयशील औरस पुत्राला दिली.१०३. पुनः त्यांनी राजाला सांगितले, 'तू आता लवकर सगळी अहंता आणि ममता सोडून इथून - ह्या तुझ्या राज्यांतून, बाहेर पड. मीहि आता लगेच गाणगापुरच्या मठाला जाऊन तिथे सर्व शिष्याचे, भक्तांचे आणि इतरांचेही समाधान करून(१०४) श्रीशैल्याला जाणार आहे. तूही त्या पवित्र पर्वतावर ये. तिथे आपली भेट होईल आणि तू कृतार्थ होशील.'१०५.

याप्रमाणे त्या बादशहाशी बोलून शिष्यपरिवारासहित श्रीगुरूंनी गोदावरी नदीला जाऊन तिथे सिंहस्थ पर्वणीचे स्नान केले. आणि परत अमरजा-भीमा संगमावर आले.१०६. तेथील सर्व लोकांना आनंद झाला. त्यांनी श्रीगुरूंची पूजा करून त्यांच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मणभोजने केली.१०७.

**तत्रत्या अपि तं दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे तदा । नीराज्य श्रीगुरुं चक्रुस् तदर्थं ब्रह्मभोजनम् ।।१०७।।**
**सर्वत्र प्रसृता भक्तिर् म्लेच्छा अपि भजन्त्यतः । कलौ घोरेऽत्र न स्थेयं साक्षादेवेत्यमंस्त सः ।।१०८।।**
**श्रीशैलमुक्तवद्गत्वा म्लेच्छायापि स सद्गतिम् । सर्वस्वात्मार्पणाद्दत्वा पुनः प्रापाव्ययो मठम् ।।१०९।।**
**तस्थौ भजत्कामधेनुः प्रत्यक्षस्तत्र वै सताम् । अगोचरस्त्वनार्याणां जन्मान्धानामिवोष्णगुः ।।११०।।**

तत्रत्या सर्वे अपि तदा तं दृष्ट्वा जल्हादिरे। श्रीगुरुं नीराज्य तत्+अर्थं ब्रह्म+भोजनं चक्रुः।१०७। 'भक्तिः सर्वत्र प्रसृता, म्लेच्छा अपि भजन्ति। अतः अत्र घोरे कलौ साक्षात् न स्थेयम्।' इति सः अमंस्त।१०८। उक्त+वत् सः श्रीशैलं गत्वा म्लेच्छाय अपि सर्वस्व+अर्पणात् सत्+गतिं दत्वा पुनः अव्ययः मठं प्राप(१०९) तस्थौ। भजत्+काम+धेनुः तत्र सतां वै प्रत्यक्षः। अन+आर्याणां तु जन्म+अन्धानां उष्णगुः इव अगोचरः।११०।

'आपल्या भक्तीचा आता सगळीकडे प्रसार झाला आहे. त्यामुळे मुसलमानही आपल्याला भजतील. म्हणून या घोर कलियुगात आपण साक्षात् - दृश्यमान स्वरूपात, राहू नये' असा प्रभूनी विचार केला.१०८. मग बादशहाला सांगितल्याप्रमाणे ते श्रीशैल्य पर्वताला गेले. त्या यवन राजाच्या सर्वस्वासहित आत्मसमर्पणाच्या फलस्वरूप त्याला उत्तम गती दिली आणि ते अविनाशी प्रभू मठात येऊन तिथेच राहिले. इथे **अपि** शब्दातून हे सुचविले आहे की इतरही भक्तांना ते सद्गती देतातच.१०९. भक्तांची कामधेनूच असलेले, नित्य भक्तांच्या कामना पुरविणारे श्रीगुरू आजही भक्तांना प्रत्यक्षच आहेत. अनार्यांना - नास्तिकांना, अभक्तांना, निंदकांना, तपहीनांना मात्र ते, जन्मांधाला जसा सूर्य, तसे अगोचर आहेत.११०.

**कृष्णापञ्चनदीयोगे प्रातः स्नात्वात्र सङ्गमे । कर्म कृत्वाह्निकं भिक्षां मठे भुक्त्वैव तिष्ठति ॥१११॥**
**दर्शिता विविधा लीला दर्शयत्यप्यनन्तशः । दर्शयिष्यति को वेत्ति प्रभावं तस्य दुर्ग्रहम् ॥११२॥**
**यो यो यस्य तु कामस्तद्भजनात्सिद्धिमेत्यरम् । भजतोऽनुभजत्येष यतोऽसौ भक्तिभावनः ॥११३॥**
**जागरूका कलौ प्रायः काचिन्न भगवत्कला । तत्साक्षाद्भगवन्तं तं श्रद्धयाऽसंशयं भज ॥११४॥**
**इति सिद्धोदितं श्रुत्वा श्रद्धयाऽसंशयं गुरुम् । अभ्यर्च्याऽऽपामृतं द्राक् तच्छ्रवणान्नामधारकः ॥११५॥**

(श्रीगुरुः) प्रातः कृष्णा+पञ्चनदी+योगे स्नात्वा सङ्गमे आह्निकं कर्म कृत्वा मठे भुक्त्वा (तत्र) एव तिष्ठति।१११। विविधा लीला दर्शिता, अनन्तशः दर्शयति, दर्शयिष्यति अपि। तस्य दुर्ग्रहं प्रभावं कः वेत्ति?११२। यः यः यस्य कामः तत्+भजनात् अरं सिद्धिं एति, यतः एष असौ भक्ति+भावनः भजतः अनुभजति।११३। 'कलौ प्रायः काचित् भगवत्+कला न जागरूका। तत् तं साक्षात् भगवन्तं श्रद्धया असंशयं भज।'११४। इति सिद्ध+उदितं श्रुत्वा नामधारकः गुरुं असंशयं अभ्यर्च्य तत्+श्रवणात् द्राक् अमृतं आप।११५।

आजही श्रीगुरू प्रातःकाळी नरसोबाच्या वाडीला कृष्णा-पंचगंगा संगमावर स्नान करून इथे भीमामरजा संगमावर आह्निक करून मठात भिक्षा (भोजन) करून तिथेच राहतात.१११. आजवर त्यांनी कित्येक लीला दाखविल्या आहेत, अगणित लीला आजही दाखवीत आहेत आहेत, भविष्यातही अशाच दाखविणार आहेत. त्यांचा अगम्य प्रभाव कुणी जाणला आहे?११२. इथे सेवा करणाऱ्यांच्या ज्या ज्या कामना असतील त्या त्या इथे तत्काल संपूर्ण होतात; कारण हे भक्तीला भाळणारे प्रभू भजणाऱ्यावर अनुग्रह करातात.११३. 'या कलियुगांत भगवंताच्या विभूतिरूप बहुतेक देवता निद्रित असतात; यासाठी या साक्षात् भगवंताची - श्रीगुरूंची, श्रद्धेने, सर्व संशय टाकून भक्ती कर.'११४. हे सिद्धमुनींचे वचन मानून नामधारकाने संशयरहित होऊन उपासना केली आणि त्या सद्गुरूंच्या गुणश्रवणाने तो लवकरच मोक्ष पावला.११५.

**तत्संवादमयं ग्रन्थं धर्म्यं गङ्गाधरात्मजः । सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत्तारकं सुधीः ।।११६।।**
**यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूत-रक्षोमुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः ।**
**सप्ताहं तत्पाठिने शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति ।।११७।।**
**स एवात्रेयगोत्रोत्थ-गणेशब्रह्मपुत्रगाम् । पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रन्थात्मा तारकोऽव्ययः ।।११८।।**

सुधीः गङ्गाधर+आत्मजः तत्+संवाद+मयं धर्म्यं तारकं सत् श्रीगुरुचरित्र+आख्यं ग्रंथं व्यरचत्।११६। एषः यत्र क्व अपि स्थापितः प्रेत+भूत+मुख्य+असत्+ग्रह+आर्तिघ्नः। सप्त+अहं तत् पाठिने शृण्वते अपि दत्तात्रेयः अभीष्ट कामान् ददाति।११७। सः एव अर्थ्यः तारकः अव्ययः ग्रन्थ+आत्मा आत्रेय+गोत्र+उत्थ+गणेश+पुत्र+गां पुनानः अत्र जयति।११८।

त्यांच्या - सिद्ध आणि नामधारक यांच्या, संवादरूप ओवीबद्ध श्रीगुरुचरित्र नावाचा धर्मप्रद ग्रंथ गंगाधरपुत्र सरस्वती यांनी मराठीत रचलेला आहे.११६. हा ग्रंथ जिथे कुठे केवळ ठेवलेलाही असला तरी भूत, प्रेत आदि दुष्ट ग्रहांची पीडा दूर होते. ह्या ग्रंथाचे सात दिवसांचे पठण अथवा श्रवण करणाऱ्याच्या अभीष्ट कामना श्रीदत्तप्रभू पूर्ण करतात.११७. तोच तारक, अविनाशी, पुरुषार्थप्रद ग्रंथस्वरूपी दत्तात्रेय आत्रेय गोत्रोत्पन्न ब्राह्मण गणेशाचा पुत्र वासुदेव याच्या वाणीला पावन करीत इथेही भक्तोद्धाररूपी विजय मिळवीत आहे.११८.

हा अंतिम श्लोक मंगलाचरणात्मक आहे. टीकेमध्ये श्रीस्वामिमहाराजांनी आपल्या अलौकिक प्रतिभेने याचे विविध प्रकारे विवरण केले आहे.

**१. ॐकारपर (ब्रह्मपर) -** कठ उपनिषदानुसार (१:२:१५-१७) 'सर्व वेदांनी प्रतिपादलेले, सर्व तपस्यांत पुरस्कारलेले, ज्याच्या प्राप्तीसाठी साधक ब्रह्मचर्य धारण करतात' अशा शब्दांत सर्व उपासकांसाठी सर्वश्रेष्ठ प्रतीक आणि आलंबन म्हणून **ॐ**काराचे प्रतिपादन केले आहे.

**ॐ नमो भगवन्विश्व-हेतो ब्रह्मोडिताज ते । मालीनो विश्वभृल्लीलाविहार्यस्यार्यभावनः ।।११९।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे पञ्चमोऽध्यायः । आदितस्त्रयोविंशोऽध्यायः ।।२३।।**

ॐ भगवन् विश्व+हेतो, ब्रह्म+ईडित, अज, ते नमः। मालीनः विश्वभृत् लीला+विहारी आर्य+भावनः असि।११९।

तसेच ते ब्रह्माचे नाम असल्याने आणि नाम आणि नामी यांचा अभेद लोकप्रसिद्ध असल्याने; वस्तुतः ॐकार हा ब्रह्माचाच विवर्त असल्याने ते आपल्या अधिष्ठानाहून वेगळे नाही; ते ब्रह्माचे नावच असल्याने '*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षत्वात्*' या न्यायाने ब्रह्म म्हणून उपास्य आहे. **ॐ** आपल्या उपासकांचे अविद्यादि अनर्थबीजांपासून रक्षण करते. '*ॐ इति ब्रह्म*' (तैत्तिरीय उ. १:८:१) 'हेच एक अक्षर ब्रह्म' (कठ उ. ८:२:१६) 'हेच खरोखर पर तसेच अपर ब्रह्म आहे' (प्रश्न उ. ५:२) श्रुतिवचनांनुसार त्या ब्रह्माचे संबोधन 'हे **ॐ**'. **भगवन् -** वेदांच्या पठणात प्रथम उच्चारले जाणारे पूजनीय अक्षर म्हणून त्याला भगवन् असे संबोधन केले आहे. जगद्रूपी पर्णशंकु (छां.उ. २:२३:३) ज्याच्या देठाच्या आश्रयाने स्थिर आहे त्या ब्रह्माशी तादात्म्य पावलेले नामधेय *ॐकार* हाच **विश्वहेतु**, जगताचे आदिकारण आहे. **ब्रह्म**णा म्हणजे वेदाने '*ॐमित्येकाक्षरम्*' अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोडित**. अकार हा सर्व वाचांचे मूळ असून सर्व व्यंजने आणि स्वर त्यांत सामावलेले आहेत (ऐतरेय आरण्यक २:३:६). त्यामुळे ॐकाराला **अज** ('अ'पासून झालेला) हे नाव सहजच आहे. किंवा **अ** म्हणजे ब्रह्मदेवाच्या कंठाला भेदून बाहेर पडलेला (अयोनिज) (बृहन्नारदीय पुराण १५११०) म्हणूनही ॐकाराला **अज** म्हणता येईल. **ते नमः** तुला नमस्कार असो. गायत्री इत्यादि जी ब्रह्मप्राप्तीची आलंबने आहेत त्यांत ॐकाराला श्रेष्ठ म्हटलेले आहे (कठ उ.१२१७; तैत्तिरीय. उ.१:४:१). सर्व आलंबनात आपल्या श्रेष्ठत्वाने शोभणारा असा **मालीनः**. अ, उ आणि म या तीन मात्रांनी स्थूल, सूक्ष्म आणि कारण या देहत्रयरूप विश्वाला पोसणारा म्हणून **विश्वभृत्**. या तीन मात्रांच्या उपासकांना पिप्पलादांनी शैब्याला सांगितल्याप्रमाणे (प्रश्न उ. ५) ऋक्, यजुः आणि साम या वेदांच्या द्वारा अनायासे लीलया त्या त्या लोकांना नेणारा तो **लीलाविहारी**. पंचीकरणाच्या

वार्तिकानुसार **आर्य** म्हणजे मुमुक्षूंना **भावयति** वाढवतो असा तो **आर्यभावन**. असा तू आहेस (**असि**).

**२. ईश्वरपर -** आपल्याला हवी असलेली वस्तू जर कुणाला मागायची असेल तर जसे आपण त्या व्यक्तीला त्याला अत्यंत आवडणाऱ्या नावाने हाक देतो तसेच ईश्वराला प्रणवाने - **ॐ**काराने साद देऊन स्तुती करतात. योगसूत्रानुसार (*तस्य वाचकः प्रणवः।* १:२७) आणि भ.गीतेनुसारही (*ॐ तत्सदिति निर्देशः ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।* १७:२३) हे देवाचे आवडते नाव आहे. '*उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम्। वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति॥*' या व्याख्येनुसार हे **भगवान्** ईश्वरा, तुला नमस्कार असो. तैत्तिरीय उपनिषदानुसार (*यतो वा इमानि भूतानिः..* ३:१) सर्व विश्वाचे आदिकारण म्हणून हे **विश्वहेतो**. जगाची सृष्टी करण्यापूर्वी ब्रह्मदेवाने ज्याची स्तुती केली तो तू **ब्रह्मोडित अजा**, तुला नमन असो (**ते नमः**). ज्याच्या ईक्षणमात्राने **मा** म्हणजे माया कार्यशील आहे; पण जो तिच्याने अस्पृष्ट - **अलीन** आहे, तो **मालीनः**. जगाच्या (*विश्व*) अध्यासाचे साक्षित्वाने भरण करतो (*भृत्*); किंवा '*फलमत उपपत्तेः।*' (ब्रह्मसूत्र ३:२:३८) या न्यायाने जगातील प्राणिमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्माचे फळ देऊन पोषण करतो असा **विश्वभृत्**. विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय या लीलांनी विहरणारा **लीलाविहारी**. '*परित्राणाय साधूनां*' या भ.गीतेतील (४:८) प्रतिज्ञेनुसार साधूंचे - आर्यांचे संरक्षण करणारा **आर्यभावन** असा तू आहेस.

**३. शिवपर -** पुष्पदंताने शिवमहिम्नस्तोत्रात (२७) '*शरणद गृणात्योमिति पदम्*', रुद्राध्यायांत '*ॐ नम*', विभूति अनुवाकांत '*नमः सोमाय*', '*नमस्ताराय*' ह्याना अनुसरून **ॐ नमः भगवन्**. भव, मृड आणि शिव या तीन रूपांनी विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय करणारा (रुद्राध्याय १६:२८), ज्याच्यापासून जग उत्पन्न होते तो *भव*, रजगुणोपाधिक स्रष्टा; *मृडयति* सुखावतो तो *मृड*, सत्त्वगुणोपाधिक पालनकर्ता; हरण करणारा *हर*, तमोगुणोपाधिक संहारकर्ता; आणि विशुद्धसत्त्वगुणोपाधिक मोक्षाचा आनंद देणारा तो *शिव*. महिम्नस्तोत्राच्या ३०व्या श्लोकात हेच प्रतिपादन आहे. **ब्रह्म** म्हणजे वेदाने '*विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमान च यत् सर्वो ह्येष रुद्रः*' (तै.आरण्यक

१०:१६:१) अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोदित**. नररुंडाची माळ घालणारा (**माली**) सर्ववंद्य - ईश्वर (**इन**) तो **मालीनः**. '*या ते रुद्र शिवा तनूः*' (शु.यजु.वा.सं. १६:२) या श्रुतीनुसार शिव तनूने विश्वाचे पोषण करणारा (दुसरी घोर रुद्र तनू) तो **विश्वभृत्**. नंदीवर बसून तंत्राच्या उपकरणांनी श्मशानांत भूतांसह लीलेने विहरणारा **लीलाविहारी**. आर्यांना - पाशुपतांना जोपासणारा तो **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**४. नारायणपर -** हे **भगवन्** नारायण! नारायणाथर्वशिर उपनिषदानुसार 'नारायणापासूनच रुद्र जन्मतो, नारायणापासूनच प्रजा उपजते'; तसेच श्वेतश्वतर उपनिषदानुसार (६:१८) 'जो आधी ब्रह्मदेवाला उत्पन्न करतो' तो **विश्वहेतू**. '*विष्णुः नः कं वीर्याणि प्रवोचम्।*' (ऋग्वेद सं. १:१५४:१) असा वेदांनी स्तवलेला **ब्रह्मोडित**; ज्याचे कारण नाही असा **अज**; तुला वंदन असो (**ते नमः**). **मा** म्हणजे लक्ष्मी तिला छातीशी धरल्याने तिच्यात लीन झालेला (**मालीन**); कच्छरूपाने विश्व धारण करणारा **विश्वभृत्**; लीलेने अवतार धारण करून भक्तांवर अनुग्रह करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्य** म्हणजे वैष्णव, त्यांचे सालोक्यादि मुक्ती देऊन संवर्धन करतो तो **आर्यभावन**.

**५. ब्रह्मदेवपर -** एकाक्षरकोशानुसार (१) अकार म्हणजे विष्णू; भ.गीतेतही (१०:३३) *अक्षराणां अकारोऽस्मि* असे म्हटले आहे. तेव्हा **अ** म्हणजे विष्णूपासून झालेला तो **अज**. ऋग्वेदाने (१०:१२१:१) '*हिरण्गर्भः समवर्तताग्रे*' असा गौरविलेला आद्य शरीरधारी म्हणून पूज्य या अर्थाने **भगवन्**. वेदानुसार (ऋग्वेद स. १०:१९०:१३) 'धात्याने पूर्वीप्रमाणेच विश्व निर्माण केले,' म्हणून **विश्वहेतो**. सर्व लोक '**ब्रह्म**' म्हणून स्तवन करतात असा **ब्रह्मोडित**. **ते नमः।** मरीच्यादि मानसपुत्र ज्याला तपादींनी शोभा आणतात (*मालंते*) असा त्यांचा स्वामी (**इन**) **मालीनः**. ऋग्वेदानुसार (१०:१२१:१) 'जो ही पृथ्वी आणि स्वर्ग धारण करतो' म्हणून **विश्वभृत्**. लीलया जगदुत्पादनाची क्रिया हाच ज्याचा विहार आहे असा **लीलाविहारी**. **आर्यांना** - समुच्चयोपासकांना बल देणारा असा **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**६. अग्निपर -** 'त्याने आपले तीन भाग केले' या श्रुतीप्रमाणे (बृहदारण्यक उ. १:२:३) तोच वायू आणि

आदित्यरूपाने राहतो म्हणून **विश्वहेतो**; '**अ**' म्हणजे विराट् देह त्याच्या मुखापसून झालेला (ऋग्वेद सं.१०:९०:१३) तो **अज**; **ते नमः** तुला नमस्कार असो. वेदात (**ब्रह्मणि**) (ऋग्वेद १:१:२) 'अग्नी पूर्वीच्या ऋषींनी स्तवलेला आहे' म्हणून **ब्रह्मोडित**. तेजस्वी असल्याने **मालीनः**. जठराग्नीच्या रूपाने विश्वांतील प्राणिमात्राचे भरणपोषण करणारा **विश्वभृत्**. देवांचा दूत होऊन जो त्याना हवि पोचविण्याची क्रिया लीलेन पार पाडीत विहरतो तो **लीलाविहारी**. ईशोपनिषदांतील प्रार्थनेनुसार धर्मनिष्ठांना (**आर्यान्**) सुपथावर नेऊन त्यांचे संवर्धन करतो (**भावयति।**).

**७. वायुपर -** 'अतति' म्हणजे व्यापतो ते आकाश म्हणजेच **अः**; त्यापासून झालेला (तैत्तिरीय उ.२:१:१) **अजः**; तुला नमस्कार असो. प्रश्नोपनिषदात प्राणाच्या उपाधीने वायूचे विश्वहेतुत्व प्रतिपादलेले आहे. '*प्राणो ब्रह्मेति व्यजानात्*' या वचनाने तैत्तिरीय उपनिषदांत (३:३) शोभून दिसणारा **माली**; '*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्*' (बृहदारण्यक उ. ३:७:२) यानुसार इंद्रियांचा प्रवर्तक आणि बलवान् असल्याने राजा (**इनः**); वृत्तींच्या द्वारा विश्वाचा पोषक (**विश्वभृत्**); प्राणोपासक **आर्यां**चे संवर्धन करणारा (**भावयति।**).

**८. सूर्यपर -** पुरुषसूक्तांत विराट पुरुषाच्या (**अः**) चक्षूंपासून झालेला म्हणून **अजः**; वेदत्रयीमय असल्याने **ॐ**कारस्वरूप; प्रातः माध्याह्न आणि सायं असा त्रिकाळ पूजिला जाणारा **भगवान्**; मैत्रायणी उपनिषदानुसार (६:३७) वृष्टी, अन्न आणि प्रजा या परंपरेने **विश्वहेतु**; तैत्तिरीय आरण्यकांत 'हा आदित्यच ब्रह्म आहे' अशी आणि ऋग्वेदांत (१:११५:१) सूर्याला जगताचा आणि त्यांतील सर्व जीवांचा आत्मा अशी त्याची स्तुती केल्याने **ब्रह्मोडित**; '**मा**' म्हणजे शोभा तिने '**अलति**' व्यापतो तो **मालीनः**; ऋग्वेदानुसार (३:५९:१) 'पृथ्वी आणि स्वर्ग यांना आधार देणारा' **विश्वभृत्**; लीलया प्रकाश करीत वरचेवर भ्रमण करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्यां**ना म्हणजे गायत्रीचा जप करणाऱ्यांचा पोषक **आर्यभावन**.

**९. रामपर -** अज म्हणजे रघूचा पुत्र, त्याच्या गोत्रांत जन्मलेला **आज** म्हणजे रामचंद्रप्रभू. राक्षसांचे निर्दलन केल्याने

**विश्वहेतु**; प्रथम भूमीवर अवतरण्यासाठी व नंतर रावणवधाप्रीत्यर्थ ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोदित**; **मा** म्हणजे माया अर्थात् सीता, तिच्यात **लीन** म्हणजे (स्त्रियांत आसक्त होण्याचे परिणाम लोकांत प्रदर्शिण्यासाठी) आसक्त तो **मालीन**. तिच्यासाठीच राक्षसांचे निर्दलन केले. धर्मस्थापनेने विश्वाचा सांभाळ केला म्हणून **विश्वभृत्**. लीलेने क्षत्रिय रूप घेऊन विहरणारा **लीलाविहारी**. बिभीषण, सुग्रीव, हनुमान अत्यादि आर्यांचासंवर्धक अर्थात् **आर्यभावन**.

**१०. कृष्णपर -** श्रीमद्भागवताच्या उक्तीप्रमाणे '*कृष्णस्तु **भगवान्** स्वयम्।*' (१:३:२८). '*अजोऽपि सन्नव्ययात्मा*' ह्या गीतोक्तीनुसार **अज**. गीतेत (९:४) त्यांनीच '*मया ततमिदं सर्वं जगत्*' असे सांगितल्याप्रमाणे **विश्वहेतु**. ब्रह्मदेवाचा गर्वपरिहार केल्यावर त्याने स्तुती केलेला **ब्रह्मोदित**. वन**माली** तर तो आहेच. **इनः** म्हणजे क्षत्रिय. दैत्यांचा निग्रह करून विश्वाचे रक्षण करणारा **विश्वभृत्**. वृंदावनांत गोपींसह व द्वारकेत सोळा हजार स्त्रियांसह विलास करणारा गोपांसह क्रीडा आणि अर्जुनाचे सारथ्य अशा **लीला** करीत **विहर**णारा. आर्य म्हणजे यादव त्यांचा रक्षणकर्ता म्हणून **आर्यभावन**.

**११. गणपतिपर -** *अजा*चा म्हणजे शिवाचा पुत्र **आजः**; अथर्वशीर्षात '*सर्वं जगदिदं त्वत्तो जायते*' असा स्तवलेला **विश्वहेतु**. निर्विघ्नतेसाठी ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**. प्रवालांच्या माळा घालणारा **माली**. विघ्नांचा **इन** (राजा). लीलेने नरगजरूपाने विहरणारा **लीलाविहारी**. गाणपत्यांचा (आर्यांचा) पोषक **आर्यभावन**.

**१२. देवीपर -** देवीच्या संदर्भांत या सर्व विशेषणांच्या स्त्रीलिंगी रूपांची योजना करावी. ***ॐ भगवती विश्वहेतुः ब्रह्मोडिता, अजा ते नमः। मालिनी विश्वभृता लीलाविहारिणी आर्यभावना असि।***

**श्रीदत्तपर -** *अज* म्हणजे ब्रह्मदेवाचा नातू **आजः**. '*ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना।।*' या व्याख्येनुसार जो संपूर्ण ऐश्वर्य, संपूर्ण धर्म, संपूर्ण यश, समग्र श्री, समग्र वैराग्य आणि समग्र मोक्ष यांनी युक्त आहे असा **भगवान्**. दत्तोपनिषदानुसार 'जो विश्वाची निर्मिती करतो आणि विश्वाचा सांभाळ

करतो' तो **विश्वहेतु** आणि **विश्वभृत्**. योगेश्वर या अर्थाने, *मा* म्हणजे *माया* तिच्यांत *अलीन* अनासक्त म्हणून **मालीन**. लीलेने अवधूतवेष घेऊन गंगास्नानादी विहार करणारा **लीलाविहारी**. भक्ताचे पालन करणारा **आर्यभावन**. तापिनी उपनिषदांत भगवान विष्णूंनी ब्रह्मदेवाला 'दत्तात्रेय नावाच्या माझ्या सात्त्विक रूपाची उपासना कर,' असे सांगितले आहे. तसेच शांडिल्याला अथर्वणाने '*शांतं आत्मप्रकाशं दत्तं ध्यायमान*' असे सांगितले आहे. त्यावरून दत्तच परब्रह्म आहेत. 'याप्रमाणे श्रीगुरूंच्या प्रेरणेने यथामती विवेचन केले.'

ग्रंथाच्या आरंभी गुरुस्तुतीच्या पहिल्या श्लोकात श्रीविष्णू, शिव, गणेश, सूर्य, शक्ती इत्यादि रूपे घेणाऱ्या सद्गुरू दत्तात्रेयाचे प्रतिपादन केले. अंती मंगलाचरणाच्या या श्लोकात बारा मुख्य देवतांची आणि दत्तप्रभूंची स्तुती एकाच श्लोकाने करून त्या सर्वांचा अभेद सिद्ध करून श्रीदत्तप्रभूच परब्रह्म आहेत हा सिद्धांत प्रस्थापित करून समारोप केला आहे. यात उपक्रम आणि उपसंहार यांची एकवाक्यता दिसून येते आणि श्रीदत्तप्रभू हेच या ग्रंथाचे तात्पर्य आहेत हे निरपवाद सिद्ध होते.

**संहितेऽयं द्विसाहस्री त्रिकांडाभीष्टदा सती। व्याख्याताऽजोऽनया प्रीयाच्छ्रीदत्तोऽयं त्र्यधीश्वराः।।**

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पाचवा आणि प्रथमपासून तेविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ योगरहस्य ।।

**श्रेष्ठपुंजन्मसाफल्यं कार्यं योगत्रयाश्रयात् । समाख्यातद्विसाहस्री-संहितासंग्रहस्त्वयम् ।।१।।**
**भक्तिं विना न साफल्यं कर्मणः कर्मणा विना । न च ज्ञानं विना ज्ञानान् न मोक्षो यस्य कस्यचित् ।।२।।**
**न ज्ञानं जीवति प्राणे मनस्यपि लयं नयेत् । यस्तौ गच्छति मोक्षं स योगी नान्यः कथंचन ।।३।।**

श्रेष्ठ+पुं+जन्म+साफल्यं योग+त्रय+आश्रयात् कार्यम्। अयं समाख्यात+द्वि+साहस्री+संहिता+संग्रहः।१। भक्तिं विना कर्मणः साफल्यं न। कर्मणा विना च ज्ञानं न। विना ज्ञानात् यस्य+कस्य+चित् मोक्षः न।२। जीवति प्राणे, मनसि अपि, ज्ञानं न। यः तौ लयं नयेत् सः योगी मोक्षं गच्छति। अन्यः कथंचन न।३।

श्रेष्ठ अशा नरजन्माचे साफल्य करावयाचे असेल तर ज्ञान, कर्म व भक्ती अशा तीनही योगांचा आश्रय करावा लागेल, हाच आतापर्यंत सांगितलेल्या द्विसाहस्री संहितेचा सारभूत अर्थ आहे. या संहितेत पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोगाचे, पुढच्या पाच अध्यायांत कर्मयोगाचे आणि अंतिम पाच अध्यायांत भक्तियोगाचे निरूपण आहे. चौदाव्या अध्यायाच्या आरंभी टीकेत ज्ञानयोगाचा अधिकार येण्यासाठी कर्मयोगाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. तसेच एकोणिसाव्या अध्यायाच्या सुरुवातीला ज्यांचे चित्त शुद्ध झाले आहे त्यांना ध्यानसिद्धीकरिता भक्तियोग सांगितला आहे. प.पू. श्रीयोगिराज गुळवणीमहाराज आपल्या योगरहस्यावरील टीकेत म्हणतात, 'याप्रमाणे वेदप्रमाणसिद्ध कर्मयोग, त्यातील न्यूनाधिकत्व दोष दूर करून त्याची पूर्णता करणारा भक्तियोग व या दोहोंचेही फल असणारा मोक्षदायक ज्ञानयोग हे तीनही योग आपल्या ठिकाणी स्थिर होण्याकरिता प्रयत्नशील राहणे हेच मनुष्य जन्माचे खरे साफल्य आहे आणि द्विसाहस्रीसहितेचा हाच सारांश आहे. असे या प्रथम लोकात श्रीमहाराजांनी सांगितले आहे.'१. भक्तीवांचून कर्माचे फळ मिळत नाही; कर्माशिवाय ज्ञान होत नाही आणि ज्ञानावाचून कुणाचाही मोक्ष होत नाही.

**चले प्राणे चलं चित्तं निश्चले निश्चलं तयोः । नष्ट एकतरे नाशो द्वयोरपि स योगतः ।।४।।**

चले प्राणे चित्तं चलम्। निश्चले निश्चलम्। तयोः एकतरे नष्टे द्वयोः अपि नाशः। सः योगतः (भवति)।४।

ज्ञानाशिवाय मोक्ष नाही हे वेदांताचा प्रमुख सिद्धांत आहे. त्याचा विचार पुढे बोधरहस्यात येणारच आहे. कर्मयोग म्हणजे वर्णाश्रमानुसार आपल्याला विहित असलेले कर्म करणे. गीतेच्या '*यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं तम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः।।१८:४६।।*' संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, '*म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे, तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आली। आकाश भूतें।।१४।।*' ज्ञानासाठी जसे कर्म आवश्यक आहे तसेच ते चित्तशुद्धीद्वारा भक्तीच्या प्रादुर्भावासाठीही आवश्यक आहे. या अभिप्रायानेच श्रीमहाराज म्हणतात की भक्तीशिवाय कर्माचे साफल्य नाही.२.

प्राण आणि मन जोवर जीवित आहेत तोवर ज्ञान होणार नाही असा सिद्धांत इथे श्रीस्वामिमहाराजांनी मांडला आहे. प्राणाचे जीवन म्हणजे इडा आणि पिंगला या नाड्यांतून (डाव्या आणि उजव्या नाकपुड्यांतून) प्राणाचे वहन. तसेच मनाचे जीवन म्हणजे संकल्प. यो दोन्हींचा जो लय करतो, या दोन्हींचा निरोध करतो तोच योगी मोक्ष पावतो. अन्य कुणीही नाही. वैद्यकशास्त्राच्या सिद्धांतानुसार श्वासोच्छ्वासरूपी प्राणाचे संचलन थांबणे हे मृत्यूचे लक्षण आहे. पण योगात हे मृत्यूशिवायही शक्य आहे. त्याचप्रमाणे 'आपापल्या विषयांचे ग्रहण इंद्रियांचे जीवन आहे; सतत नाना प्रकारचे संकल्प-विकल्प करून विविध वृत्ती उठवणे हे मनाचे जीवन आहे. त्यांचा निरोध इथे विवक्षित आहे. प्राण किंवा मन यांचा स्वरूपनाश नाही.' (हठयोगप्रदीपिका टीका ४:१५). योगशास्त्रानुसार ब्रह्मरंध्रात (मस्तकात) प्राणाची निश्चल स्थिती हाच प्राणाचा लय. तसेच इतर विषयांपासून निवृत्त ध्येयाकार होऊन स्थिरावणे हा मनाचा लय होय. मूर्छा किंवा झोप यांपेक्षा ही वेगळी अवस्था आहे.३.

**भक्तिक्रियाज्ञानयोगान् मुक्तिरुक्तापि तत् त्रयम् । ज्ञेयं साष्टाङ्गयोगान्तर्गतं द्वैधमतोऽत्र नो ।।५।।**

भक्ति+क्रिया+ज्ञान+ योगात् मुक्तिः उक्ता। तत् त्रयं स+अष्ट+अङ्ग+योग+अन्तः+गतम्। ततः अत्र द्वैधं नो।५।

**अष्टांगयोगांत तीनही योगांचा अंतर्भाव.** प्राण चालतो तोपर्यंत चित्तही (मन) चालते. या दोन्हींपैकी एक स्थिर झाले की दुसरेही थांबते. असे प्राण आणि मन परस्परांशी निगडित आहेत. या दोन्हींचे स्थैर्य संपादन करण्यासाठी योगाची आवश्यकता इथे महाराजांनी प्रतिपादिली आहे. हीच योगाची व्याख्याही होते. पतंजलींच्या व्याख्येतला '*चित्तवृत्तिनिरोधः*' यात समाविष्टच आहे. आत्मज्ञानासाठी म्हणजेच मोक्षासाठी योगाची आवश्यकता प्रतिपादणारी वचने वेद-शास्त्र-पुराणे यांतून प्रचुर आहेत. त्यांचा निर्देश इथे विस्तारभयाने करता येत नाही. श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणांत (२:२:१-२) सांगितल्याप्रमाणे 'सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्री-पुरुष, बाल, युवा, वृद्ध यांना योगाभ्यासाचा अधिकार आहे. आणि त्यानी अभ्यास केला तर ते सिद्धीही प्राप्त करू शकतात.'४. श्रीमद्भागवतात उद्धवगीतेत (११.२०.६) '*योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया। ज्ञानं कर्म च भक्तिश्च नान्योपायोऽस्ति कर्हिचित।।*' असे प्रतिपादन केलेले आहे. या तीन्हींपेक्षा वेगळा योगच हा मोक्षाला उपाय कसा ठरतो? या आक्षेपाच्या समाधानासाठी श्रीमहाराज सांगतात, 'हे तीनही उपाय अष्टांगयोगात अंतर्भूत आहेत. त्यामुळे इथे कांही विरोधाचा प्रश्नच येत नाही.' यापैकी योगाचे आचार्य पतंजली यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी अशी योगांची आठ अंगे सांगितली आहेत. संप्रज्ञात समाधी हा आठ अंगांपैकी शेवटचे अंग असून यांचा अंगी जो योग तो म्हणजे असंप्रज्ञात समाधी होय. त्यांपैकी **नियम** या अंगाची व्याख्या करणारे सूत्र '*शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः*।२:३२।' यांपैकी तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या तिघांचे पतंजलींनी **क्रियायोग** असे वेगळे वर्गीकरण केले आहे (२:१). उपवास, कृच्छ्र, चांद्रायणादि व्रतांनी शरीर झिजवणे म्हणजे **तप**. उपनिषत्, शतरुद्रीय, प्रणव इत्यादिकांचा जप म्हणजे स्वाध्याय आणि नवविधा भक्ती म्हणजे **ईश्वरप्रणिधान**. **स्वाध्याय** या नियमात मोक्षाच्या साधनांचा अभ्यास समाविष्ट आहे. हेच ज्ञानयोगातील श्रवण आणि मनन होत. ज्ञानयोगाचा

**नात्यश्नतोऽनश्नतोऽति-सुप्तस्यैष न जाग्रतः । युक्तचेष्टाहारनिद्रा-गतेर्योगो भवेत्सुखः ।।६।।**

न अति+अश्नतः, न अन्+अश्नतः, (न)अति+सुप्तस्य, न जाग्रतः (योगो भवेत्)। युक्त+चेष्टा+आहार+निद्रा+गतेः सुखः योगः भवेत्।६।

तिसरा भाग निदिध्यासन तो योगाच्या **ध्यान** या अंगाशी समानार्थक आहे. याच क्रियायोगात कर्मयोग आणि भक्तियोग यांचाही अंतर्भाव आहे. ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम कर्मानुष्ठान म्हणजे कर्मयोग. श्रवण, कीर्तन इत्यादि नवविधा भक्तीला साधन भक्ती म्हणतात. दुसरी फलरूप भक्ती म्हणजे ईश्वराविषयी प्रेम. 'ईश्वरचरणाविषयी अंतःकरणात उत्पन्न झालेला निर्व्याज, अव्यभिचारी असा अविच्छिन्न प्रेमप्रवाह म्हणजे प्रेमभक्ती. अशी नारायणतीर्थांची व्याख्या आहे. चित्त प्रेमार्द्र होऊन ईश्वराकार होणे म्हणजे प्रेमभक्ती असे मधुसूदन-सरस्वती म्हणतात.' ही भक्ती अष्टांगयोगातली संप्रज्ञात समाधीच आहे असे भक्तिशास्त्रकार मानतात. १९व्या अध्यायाच्या ३ऱ्या श्लोकात हा विचार श्रीमहाराजांनी मांडलेला आहे. तो पुन्हा वाचण्यासारखा आहे. या श्लोकातील तीनही मोक्षोपाय योगात अंतर्भूत आहेत असे म्हणताना श्रीस्वामिमहाराजांची समन्वयात्मक दृष्टी समजून घेतली नाही तर योग आणि इतर साधने यांचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व असा कदाचित् वाद उद्भवू शकतो. तीनही मोक्षाचे मार्ग परस्परपूरक आहेत आणि त्यांच्यात कांहीच विरोध नाही हा खरा या श्लोकाचा आशय आहे. प.पू. योगिराजांनी म्हटल्याप्रमाणे, 'कोणत्याही प्रकारे अभिनिवेश न ठेवता ईश्वरस्मरणपूर्वक आपापले साधन निष्ठेने करून साधकाने आत्मकल्याण साधण्याकडे विशेष लक्ष द्यावे.'५.

या श्लोकात आहारविहारादींचे नियमन सांगितले आहे.

**आहार** फार जास्ती किंवा फार कमी नसावा. आवश्यक आणि मानवेल तेवढाच आहार घ्यावा. कमी घेतला तर शरीर आणि मन अशक्त होईल व अभ्यासाला साथ देणार नाही. जास्त घेतला तर आळस, झोप आणि रोग यांना आमंत्रण दिल्यासारखे होईल. '*अर्धमानस्य सव्यञ्जनस्य तृतीयमुदकस्य तु। वायोः संचरणार्थाय चतुर्थमवशेषयेत्।।*' अगदी पोटभर जेवूं नये. अर्धे पोट भरेल एवढेच अन्न घ्यावे.

**तस्माद्वैराग्यतोऽभ्यासं गुरोरग्रे वितन्वतः । योगस्य प्राप्य संसिद्धिं विद्वान्मुक्तो भवेद्द्रुतम् ।।७।।**

तस्मात् वैराग्यतः गुरोः अग्रे अभ्यासं वितन्वतः योगस्य संसिद्धिं प्राप्य विद्वान् द्रुतं मुक्तः भवेत्।७।

चौथा भाग पाणी प्यावे आणि उरलेला चौथा भाग वायूच्या संचरणाला रिक्त ठेवावा असे भारतीय आहारशास्त्र सांगते. आहारही आश्रमानुसार अधिक-उणा करावा असे स्मृतिग्रंथांत सांगितले आहे. '*अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः षोडशारण्यवासिनः। द्वात्रिंशत्तु गृहस्थस्य यथेष्टं ब्रह्मचारिणाम्।।*' संन्याशाने आठ घास (तोंड फार न पसरता), वानप्रस्थाने सोळा, गृहस्थाने बत्तीस तर ब्रह्मचाऱ्याने कितीही घास घ्यावेत. युक्त आहार यात आहाराच्या पावित्र्याचाही विचार अपेक्षित आहे. शुचितेने सिद्ध केलेला, देवाला अर्पण केलेला, मित (मोजका) आणि सात्त्विक आहार घ्यावा.

**निद्रा**सुद्धा योग्यच प्रमाणात घेतली पाहिजे. रात्री उशीरा झोपणे आणि सकाळी उशीरा उठणे हे शरीराला वा मनालाही हितावह नाही. सूर्यास्तानंतर ३-४ तासांनी झोपावे व सूर्यास्तापूर्वी एक-दीड तास आधी उठावे असा सर्वसाधारण नियम आहे. अधिक कार्यमग्नता, अधिक हालचाल आणि अधिक प्रवास हे योगाभ्यासाला बाधक आहेत.

'*अत्याहारः प्रयासच प्रजल्पो नियमग्रहः। जनसंगश्च लौल्यंच षड्भिर्योगो विनश्यति।। उत्साहात्साहसाद्धैर्यात्तत्वज्ञानाच्च निश्चयात्। जनसंगपरित्यागात्षड्भिर्योगः प्रसिद्ध्यति।।*' अधिक आहार, अतिश्रम, अतिबडबड, उपवास, फलाहार इत्यादि नियम धरणे, लोकांत जास्ती वावरणे आणि कामासक्ती ह्या सहा गोष्टी योगाला बाधक आहेत. मी चित्त स्थिर करीनच असा उत्साह, साध्य-असाध्य हा विचार दूर सारून साधनाकडे प्रवृत्त होणे हे साहस; यावज्जीव प्रयत्न करीत राहणे, कधीही खिन्न न होणे हे **धैर्य**; संपूर्ण दृश्य विषय, मृगजळाप्रमाणे आभासमात्र अस्थिर आहेत, फक्त परमात्माच स्थिर आहे ही दृढबुद्धी म्हणजे **तत्त्वज्ञान**; शास्त्राचे व गुरूंचे सांगणे पूर्णपणे खरे आहे असा विश्वासरूप **निश्चय**; योगाभ्यासाला प्रतिकूल अशा विषयासक्त **लोकांच्या संगतीचा त्याग**; या सहा गुणांनी योगाची फलसिद्धी होते.६.

**क्षाराम्लतिक्तकटुरुक्षकदन्नशाक-स्त्र्यग्न्यध्वभाङ् न लभतेऽकुशलोऽस्य सिद्धिम् ।**
**शुण्ठीसितासुमनशालिसदन्नमुद्ग-चक्षुष्यशाकघृतदुग्धसदम्बु पथ्यम् ।।८।।**

क्षार+अम्ल+तिक्त+कटु+रुक्ष+कदन्न+शाक+स्त्री+अग्नि+अध्व+भाक् अकुशलः अस्य सिद्धिं न लभेत्। शुण्ठी+सिता+सुमन+शालि+सत्+अन्नम् उद्ग+चक्षुष्य+शाक+ घृत+दुग्ध+सत्+अम्बु पथ्यम्।८।

वैराग्यपूर्वक गुरूच्या दृष्टीसमोर अभ्यास करणाऱ्या साधकाला, योगाची फलसिद्धी प्राप्त होऊन, तो आत्मज्ञान संपन्न होतो व शीघ्र मुक्त होतो.७. खारट, आंबट, कडू, तिखट, स्निग्ध नसलेले जोधळे, उडीद इत्यादि धान्य, आणि प्रायः सर्व भाज्या असे पदार्थ, विशेष आवडीने खाणारा, स्त्रीसंग करणारा कामातुर, अग्नीजवळ बराच वेळ शेकत बसणारा, नेहेमी पायी प्रवास करणारा आणि अभ्यासात हुषारी नसणारा, अशा मनुष्याला योगाची फलसिद्धी प्राप्त होत नाही. सुंठ, साखर, गहू, तांदूळ, वरई, सावे, मूग, डोळ्याला हितकारक अशा भाज्या, तूप, दूध, उत्तम शुद्ध पाणी हे सर्व योगाभ्यास करणाऱ्याला पथ्यरूप हितावह असे आहे. बहुतेक सर्वच शाका (पालेभाज्या) डोळ्यांना हितावह नाहीत. चक्षुषी म्हणजे डोळ्यांना हितावह अशा पाच भाज्या टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी दिल्या आहेत. त्यांची नावे संस्कृत व कंसांत हिन्दी दिली आहेत. जीवन्ती (जीयाति, हरणवेल, हरणदोडा), वास्तु (हेतुया, बथुवा, चंदनबथुवा), मत्स्याक्षी (छछमछरी, मछेछी, सोमवल्लरी), मेघनादा(मा) (चवराई, मोथ) म्हणजे चवळी, पुनर्नवा (करला, घेटुळी). अष्टांगमिथुनाने स्त्रीसेवन, शेकण्याने अग्निसेवन, प्रवासाने अध्वसेवन ही योगाभ्यासाला प्रतिकूल आहेत.८.

**सद्देशे मठिकामध्ये निश्चिन्तो गुरुशिक्षितः । कुशाजिनांशुकेष्वेव हठयोगं समभ्यसेत् ।।९।।**
**गुदमेण्ढ्रोर्ध्वस्थगुल्फमासीनो यतगुः समः । भ्रूमध्यदृग्वान्यपीठैः सिद्धं तत्राप्यदोऽस्ति सत् ।।१०।।**

सत्+देशे, मठिका+मध्ये निश्चिन्तः गुरु+शिक्षितः कुश+अजिन+अंकुशेषु एव हठयोगं समभ्यसेत्।९। गुद+मेण्ढ्र+ऊर्ध्व+गुल्फ+आसीनः यत+गुः समः वा अन्य+पीठैः। अदः सिद्धं तत्र अपि सत् अस्ति।१०।

योगाभ्यासाचे स्थान पवित्र असावे. याविषयी हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे, '*सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे। धनुः प्रमाणपर्यन्त शिलाग्निजडवर्जिते।। एकान्ते मठिकामध्ये स्थातव्यं हठयोगिना।।* हठयोगप्रदीपिका १:१२।।' ज्ञानेश्वरीत ६व्या अध्यायात ११व्या श्लोकावरील भाष्य वाचण्यासारखे आहे. एखाद्या छोट्याशा झोपडीत, दर्भासनावर कृष्णाजिन आणि त्यावर स्वच्छ धुतलेले वस्त्र अशा आसनावर बसावे. निश्चिंत या शब्दाने प्रापंचिक विवंचनापासून शक्य तो दूर राहण्यास सुचविले आहे. हठयोगाचा निर्देश इथे केला आहे. याची व्याख्या टीकेत अशी केली आहे. 'हकार' म्हणजे सूर्य म्हणजेच प्राण आणि 'ठकार' म्हणजे चंद्र अर्थात् अपान. त्या दोहोंचा - प्राण आणि अपान यांचा योग म्हणजे हठयोग.

ह्या हठयोगाचा अभ्यास गुरूंच्या मार्गदर्शनाखालीच करावा हे **गुरुशिक्षितः** या शब्दाने सुचविले आहे. ही सूचना अतिशय महत्त्वपूर्ण आहे. पुढे सांगितलेला योगाभ्यास पुस्तकात वाचून करण्यात धोका आहे. **विद्वान् आणि अनुभवसंपन्न गुरूंच्या उपस्थितीतच हा अभ्यास केला पाहिजे**.९. गुद आणि वृषण यांच्यामध्ये असलेल्या शिवणीवर एका पायाची टाच व शिश्नाच्या वर दुसरी टाच ठेवून, इंद्रियांचा निग्रह करून व दृष्टी भ्रूमध्यावर स्थिर करून बसल्याने सिद्धासन होते. ह्या किंवा इतर आसनावर बसावे. पण हे सिद्धासनच सर्व आसनात श्रेष्ठ आहे. ह्या आसनाच्या अभ्यासाने मूलबंध, उड्डियान बंध व जालंधर बंध हे तीनही अनायास लागतात आणि साधक उन्मनी अवस्थत जातो. (हठयोगप्रदीपिका १:४२) बारा वर्षे सिद्धासनाचा अभ्यास केल्याने योगसिद्धी प्राप्त होते.१०.

**वायुं शक्त्येडयापूर्य हृदि स्थाप्य हनुं जपन् । हंसं शक्त्या कुम्भयित्वा पश्चादाकर्षितोदरः ।।११।।**
**शनैर्विरेचयेदेष प्राणायामः सुसिद्धिदः । पञ्चर्ध्याह्न्यह्न्यशीत्यन्तैः प्रतिसन्ध्यसुयामकैः ।।१२।।**
**गन्तव्यमार्गस्थशक्ति-चालनाद् भस्रया भवेत् । नाडीशुद्धिस्त्रिमासोर्ध्वं प्राणो याति लयं सहृत् ।।१३।।**

वायुं शक्त्या ईडया आपूर्य हनुं हृदि स्थाप्य हंसं जपन् शक्त्या कुम्भयित्वा, पश्चात् आकर्षित+उदरः।११। शनैः विरेचयेत्। एष प्राणायामः सु+सिद्धि+दः। अह्नि अह्नि पंच+ऋध्या अशीति+अन्त्यैः प्रति+सन्धि+असु+यामकैः।१२। भस्रया गन्तव्य+मार्गस्थ+शक्ति+चालनात् त्रि+मास+ऊर्ध्वं नाडी+शुद्धिः भवेत्। प्राणः सहृत् लयं याति।१३।

शक्तीप्रमाणे डाव्या नाकपुडीने वायू आत घेऊन म्हणजे **पूरक** करून, हृदयावर हनुवटी ठेवून गायत्री-मंत्र किंवा सोहंमंत्र यांचा मानसिक जप करीत राहून, शक्तीप्रमाणे **कुंभक** करून, नंतर आपले पोट आत ओढून(११) साधकाने तो वायू हळूहळू उजव्या नाकपुडीने बाहेर सोडावा म्हणजे **रेचक** करावा. हा पूरक, कुंभक व रेचक मिळून एक प्राणायाम होतो. तो उत्तम सिद्धी देणारा आहे. असे प्राणायाम प्रतिदिवशी त्रिकाल करावेत व ते पाच पाच या प्रमाणाने वाढवून ऐंशीपर्यंत न्यावेत.१२. तसेच, पुढे सांगितलेली भस्त्रिका व प्राणवायूच्या गमनाला योग्य अशा सुषुम्णा मार्गांतील शक्तीचे चालन करावे. याप्रमाणे प्राणायाम, भस्त्रिका व शक्तिचालन या तीन साधनांच्या अभ्यासाने तीन महिन्यांनंतर सर्व नाड्यांची शुद्धी होते आणि प्राणवायू चित्तासह विलीन होतो.१३. हा सुषुम्णेत प्रवेश केलेला प्राण ब्रह्मरंध्रात (टाळू) जाऊन तिथे दोन पळे आणि पाच विपळे (५० सेकंद) इतका वेळ स्थिर झाला की एक **प्राणायाम** होतो.१४. इथून हा काळ बारापट वाढत गेला की अनुक्रमे **प्रत्याहार** (१०मिनिटे), **धारणा** (दोन तास), **ध्यान** (चोवीस तास) आणि **समाधी** (बारा दिवस) सिद्ध होतात. बारा दिवसांची **समाधी** ही अत्यंत दुर्लभ आहे.१५.

**प्राणायाम** म्हणजे आपल्या शरीरात संचार करणारा जो **प्राण** नामक वायू आहे त्याचा **आयाम** म्हणजे निरोधन. याचे तीन प्रकार आहेत. शरीराबाहेरील वायू आत ओढून घेणे याला **पूरक** म्हणतात. तो कुंभ म्हणजे घागरीत भरल्यासारखा शरीरात धरून ठेवणे याला **कुंभक** म्हणतात. आणि तो वायू बाहेर सोडणे याला **रेचक** असे नाव आहे.

**लीनः सपञ्चविपल-द्विपलं सोऽसुयामकः । ब्रह्मरन्ध्रे वर्धमानः प्रत्याहारादयः स तु ।।१४।।**

स+पञ्च+विपलं+द्विपलं ब्रह्मरंध्रे लीनः सः असु+यामकः। सः वर्धमानः तु प्रत्याहार+आदयः।१४।

बहुतेक कुंभक पूरकानंतर केले जातात. त्यांना पूरकपूर्वक कुंभक म्हणतात. सूर्यभेदन, उज्जायी इत्यादि त्यांची उदाहरणे आहेत. रेचकानंतर प्राण बाहेरच अडवून धरणे ह्याला रेचकपूर्वक कुंभक (बहिःकुंभक) म्हणतात. रेचक किंवा पूरक न करता प्राण नाकपुड्यांतच धरून ठेवणे याला केवलकुंभक म्हणतात. (*'न रेचको नैव च पूरकोऽत्र नासापुटे संस्थितमेव वायुं। सुनिश्चलं धारयते क्रमेण कुंभाख्यमेतत्प्रवदन्ति तज्ज्ञाः।।'*)

**प्राणायामाच्या श्रेणी -** प्राणायामाच्या श्रेणी त्याच्या कालावरून ठरतात. त्यासाठी मात्रा हे माप आहे. साधारणतः मनुष्य झोपलेला असताना त्याचा एक श्वासोछ्वास व्हायला लागणारा काळ म्हणजे मात्रा. हा काळ गुडघ्यावरून हात फिरवून एक चुटकी वाजवायला लागणाऱ्या काळाइतका स्कंद पुराणात सांगितला आहे. बारा मात्रांचा प्राणायाम साधारण, चोवीस मात्रांचा मध्यम आणि छत्तीस मात्रांचा उत्तम प्राणायाम होतो. साधारण प्राणायामाने घाम येतो, मध्यम प्राणायामाने शरीर कापते आणि उत्तम प्राणायामाने प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिरावतो.

प्राणायाम प्रातः, माध्याह्न, सायं आणि मध्यरात्री करावेत. मध्यरात्री करण्यास अशक्त असेल त्याने त्रिकाल करावेत. वर सांगितल्याप्रमाणे एका वेळी ऐंशी प्राणायाम केल्याने रोज २४० प्राणायाम होतात. तीन महिन्यांत २१६००, म्हणजे २४ तासांतील श्वासांच्या संख्येइतके प्राणायाम होतात. हे प्राणायामांचे एक पुरश्चरणच होते. याचे फळ नाडीशुद्धी हे सांगितले आहे. नाडीशुद्धीची लक्षणे हठयोगप्रदीपिकेत २ऱ्या उपदेशात पुढीलप्रमाणे दिली आहेत. *'यदा तु नाडीशुद्धिः स्यात्तदा चिन्हानि ब्राह्यतः। कायस्य कृशताकांतिस्तदा जायेत निश्चितम्।।१९।। यथेष्टधारणं वायोरनलस्य प्रदीपनम्।नादाभिव्यक्तिरारोग्यं जायते नाडिशोधनात।।२०।।*

**स्वकालद्वादशगुणोत्तरकालावधिः स्मृतः । समाधिर्द्वादशदिन-साध्यः परमदुर्लभः ।।१५।।**

स्वकाल+द्वादश+गुण+उत्तर+काल+अवधिः स्मृतः। समाधिः द्वादश+दिन+साध्यः परम+दुर्लभः।१५।

शरीर कृश परंतु तेजस्वी होणे, वायु कितीही वेळ धरून ठेवता येणे, जठराग्नी प्रदीप्त होणे, आपल्या शरीरांत अनाहत नाद ऐकू येणे आणि आरोग्य ही ती लक्षणे आहेत. प्राणायामाच्या पूर्वतयारीसाठी शरीरातील कफ, लठ्ठपणा इत्यादि दोषांच्या शुद्धीसाठी धौती, बस्ती, नेति, त्राटक, नौली आणि कपालभाति अशा **षट्क्रिया** हठयोगात सांगितल्या आहेत. याज्ञवल्क्यादी आचार्यांच्या मते हे दोष प्राणायामानेच दूर होतात. त्यामुळे श्रीमहाराजांनी इथे षट्क्रिया सांगितल्या नाहीत. कपालभाति पुढे सांगितली आहे.

**बंधत्रय -** पूरकानंतर हनुवटी छातीला टेकून कुंभक करावा असे जे वर सांगितले आहे त्या क्रियेला **जालंधरबंध** असे म्हणतात. (*कंठाकुंचनपूर्वकं चिबुकस्य हृदि स्थापनं जालधरबंधः।३*) कुंभकानंतर रेचकाच्या आधी पोट आत पाठीकडे ओढायला सांगितले आहे तो **उड्डियान बंध** होय. (*प्रयत्नविशेषेण नाभिप्रदेशस्य पृष्ठत आकर्षणमुड्डियानबंधः*) पूरकाच्या आधी **मूलबंध** (शिवणीवर टाचेने दाबून गुदद्वाराचे आकुंचन) केला जातो. (*पार्ष्णिभागेन (गुल्फयोरधः प्रदेशः) योनिस्थानसंपीडनपूर्वकं (योनिस्थानं गुदमेढ्रयोर्मध्यभागं) गुदस्याकुंचनं मूलबंधः*). पूरकाच्या आधी मूलबंध व नंतर जालंधरबंध केल्याने प्राण ब्रह्मनाडीत म्हणजेच सुषुम्णेत प्रवेश करतो असे हठयोगप्रदीपिकेत सांगितले आहे. *पूरकांते तु कर्तव्यो बंधो जालंधराभिधः। कुंभकान्ते रेचकादौ कर्तव्यस्तूड्डियानकः।। अधस्तात्कुंचनेनाशु कंठसंकोचने कृते । मध्ये पश्चिमतानेन स्यात्प्राणो ब्रह्मनाडिगः।।* (हठयोगप्रदीपिका २।४५-४६)

या तीन बंधांचे फळ **कुंडलिनी शक्तीचे जागरण** हे आहे. ब्रह्मनाडीत प्राणाचा प्रवेश त्याचाच संकेत देते. हठयोगप्रदीपिकेत याचे असे वर्णन आहे. *अपाने ऊर्ध्वगे जाते प्रयाते वन्हिमण्डलम्। तदाऽनलशिखा दीर्घा जायते वायुनाऽऽहता।।६६।। ततो यातो वन्ह्यपानौ प्राणमुष्णस्वरूपकम्। तेनात्यन्तप्रदीप्तस्तु ज्वलनो देहजस्थता।।६७।। तेन*

**समासीनो यतास्योऽन्तः-प्राणं दक्षिणया त्यजेत् । सारं लगति हृत्कण्ठ-कपोलावध्यसौ यथा ।।१६।।**
**लोहकारस्य भस्रावच्छक्त्याश्वापूर्य रेचयेत् । वामां मध्यानामिकाभ्यां धृत्वा जाते श्रमे विधेः ।।१७।।**
**पीत्वा प्राणं कुम्भयित्वा धृत्वाङ्गुष्ठेन दक्षिणम् । वामया रेचयेन्मन्दं तथाथ प्राग्वदाचरेत् ।।१८।।**
**द्विनाड्यभ्यासाद्यामार्धं शक्तिर्मार्गं ददात्यरम् । भस्रेयं सर्वदोषघ्नी रुक्पापघ्न्यपि सिद्धिदा ।।१९।।**

सं+आसीनः यत+आस्यः अन्तः+प्राणं दक्षिणया स+आरं त्यजेत् यथा असौ हृत्+कण्ठ+कपोल+अवधि लगति।१६। लोहकारस्य भस्रावत् शक्त्या आशु आपूर्य वामां मध्य+अनामिकाभ्यां धृत्वा रेचयेत्। विधेः श्रमे जाते..।१७। प्राणं पीत्वा अङ्गुष्ठेन दक्षिणं धृत्वा वामया मन्दं रेचयेत्। तथा अथ प्राक्+वत् आचरेत्।१८। द्वि+नाडी+अभ्यासात् शक्तिः अरं मार्गं ददाति। इयं भस्रा सर्व+दोष+घ्नी, रुक्+पाप+घ्नी अपि सिद्धि+दा।१९।

*कुण्डलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते। दण्डाहता भुजङ्गीव निःश्वस्य ऋजुतां व्रजेत्।।६८।। बिलं प्रविष्टेव ततो ब्रह्मनाड्यन्तरं व्रजेत्। तस्मान्नित्यं मूलबंधः कर्तव्यो योगाभिः सदा।।६९।।* (ह.यो.प्र. ३). मूलबंधाच्या अभ्यासाने ऊर्ध्वगामी झालेला अपानवायू वह्निमंडलात (मणिपूर चक्रांत) प्रविष्ट झाला की वायूने प्रेरित होऊन एक उंच अग्निशिखा निर्माण होते आणि देहस्थ अग्नी अत्यंत प्रदीप्त होतो. त्याने तापलेली कुंडलिनी जागते आणि आपली वक्रता सोडून काठीने मारलेल्या नागिणीसारखी सरळ आणि ताठ होते. मग सुषुम्णेच्या मुखात शिरून ब्रह्मनाडीत जाते.

**भस्त्रिका -** प्रथम समस्थितीत बसावे. समस्थिती म्हणजे सरळ पण ताणरहित. तोंड बंद करावे आणि फुप्फुसातला प्राणवायु हृदय, कंठ आणि गालाला लगटून लोहाराच्या भात्यासारखा आवाज करीत बाहेर सोडावा (रेचक करावा).१६. डावी नाकपुडी मधले बोट आणि अनामिका यांनी दाबून बंद करून उजव्या नाकपुडीने वायू वेगाने आवाज करीत आत घेऊन (पूरक), कुंभक न करता त्याच नाकपुडीने पुन्हा बाहेर सोडावा. असे भराभर पूरक व रेचक केल्यावर श्रम झाल्यावर(१७) पूरक करून अंगठ्याने उजवी नाकपुडी बंद करून डाव्या नाकपुडीने हळूहळू रेचक करावा. मग आधीच्यासारखेच भात्यासारखा आवाज करीत वेगाने रेचक आणि पूरक डाव्या नाकपुडीने करावेत.१८. दोन्ही नाड्यांनी

**शिश्ननाभ्यन्तस्थकन्दं सति वज्रासने पदौ । धृत्वा दृढं प्रपीड्यारं भस्रां सिद्धासनस्थितः ।।२०।।**
**समाकुञ्चितनाभिर्द्राक् कुर्याच्छक्तिश्चलत्यतः । यामार्धाभ्यासतो धैर्यान्मध्यनाड्यां समुद्गता ।।२१।।**
**ऊर्ध्वाकृष्टा भवेत्किञ्चिच्छक्तिर्नाडीमुखं त्यजेत् । ततः स्वतो व्रजत्यूर्ध्वं प्राणोऽतस्तां विचालयेत् ।।२२।।**
**चालनात्सर्वसिद्ध्याप्तिर्-मण्डलाद्योगिनो न तु । रुग्भ्यो भयं यमाच्चापि नेतोऽन्यन्नाडिशोधनम् ।।२३।।**

वज्र+आसने सति पदौ दृढं धृत्वा शिश्न+नाभि+अन्तस्थ+कन्दं प्रपीड्य सिद्धासन+स्थितः..।२०। सं+आकुंचित+नाभिः द्राक् भस्रां कुर्यात्। अतः शक्तिः चलति। धैर्यात् याम+अर्ध+अभ्यासतः मध्यनाड्यां समुद्गता..।२१। शक्तिः किञ्चित् ऊर्ध्व+आकृष्टा भवेत्, नाडी+मुखं त्यजेत्। ततः प्राणः स्वतः ऊर्ध्वं व्रजति। अतः तां विचालयेत्।२२। चालनात् मण्डलात् योगिनः सर्व+सिद्धि+आप्तिः, रुक्+भ्यो भयं न, यमात् अपि च (च)। इतः अन्यत् नाडि+शोधनं न।२३।

(नाकपुड्यांनी) मिळून भस्रिकेचा अभ्यास अर्धा प्रहर (दीड तास) केल्यावर शक्ती (प्राणाला) शीघ्र (पश्चिम) मार्ग देते. म्हणजे कुंडलिनीचा सुषुम्णेत प्रवेश करून देते. ह्या भस्रिकेच्या अभ्यासाने कफादि दोष, रोग आणि पाप यांचा नाश होतो.१९. हठयोगप्रदीपिकेत (२:४४) आठ प्रकारचे कुंभक सांगितलेले आहेत. सूर्यभदेन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्रिका, भ्रामरी, मूर्छा आणि प्लावनी (*सूर्यभेदनमुज्जायी सीत्कारी शीतली तथा। भस्रिका भ्रामरी मूर्छा प्लावनीत्यष्ट कुंभकाः।।२:४४।।*). इथे श्रीस्वामिमहाराजांनी विशेष महत्त्वाच्या भस्रिकेचेच मुख्यतः वर्णन केले आहे.

**शक्तिचालन -** शिश्न आणि नाभी यांच्यामध्ये नऊ अंगुळे (बोटे) लांबीचा अंडाकार कंद असतो. त्याच्यापासून शरीराच्या ७२ हजार नाड्या उगम पावतात. '*ऊर्ध्वं मेंढ्रादधो नाभेः कंदयोनिः खगांडवत्। तत्र नाड्यः समुत्पन्नाः सहस्राणां द्विसप्ततिः।।*' (गोरक्षनाथ). त्यांपैकी मुख्य नाडी सुषुम्णा आहे. तिचे मुख कुंडलिनी शक्तीने अडवलेले असते. तिला विचलित करणे हा कंदताडनाचा उद्देश्य आहे. वज्रासनावर बसून दोन्ही पाय घट्ट धरून दोन्ही टाचांनी त्या कंदाला ताडन करावे.२०. नंतर पुनश्च सिद्धासन घालून गुरूंकडून समजून घेतलेल्या परिधानयुक्तीने बेंबीचे

**चालितायामपि प्राणो बद्धा चेद्रसना सुखम् । व्रजत्यूर्ध्वं सिद्धिपूर्वं राजयोगपदप्रदः ।।२४।।**
**जिह्वां मूलशिरां छित्वा रोममात्रं प्रघर्षयेत् । पथ्यासैन्धवचूर्णैर्गां प्राग्वत्सप्तदिनैर्मुहुः ।।२५।।**
**षण्मासादिति जिह्वाधः शिराबन्धो विनश्यति । मुद्रा स्यात् खेचरी त्र्यध्वे योजिताऽवाङ्मुखी कला ।।२६।।**
**सहृज्जिह्वा चरत्यस्य खे कदापि स्पृशन्ति नो । विषार्तिरुग्जराक्षुत्तृण्निद्रातन्द्रामृतिक्रियाः ।।२७।।**
**स्त्र्याश्लेषितस्यापि बिन्दुर् न क्षरत्यूर्ध्वमेति सः । चलितश्चेद्योनिमुद्रा-बद्धो मुक्तः स भोग्यपि ।।२८।।**

(शक्तेः) चालितायां अपि रसना बद्धा चेत् राजयोगप्रदः प्राणः सुखं सिद्धि+पूर्वं ऊर्ध्वं व्रजति।२४। जिह्वां मूल+शिरां छित्वा गां पथ्या+सैंधव+चूर्णैः रोम+मात्रं प्रघर्षयेत्। मुहु सप्त+दिनैः प्राक्+वत्।२५। इति षण्+मासात् जिह्वा+अधः शिरा+बन्धः विनश्यति।२६। अवाक्+मुखी कला त्रि+अध्वे योजिता खेचरी मुद्रा स्यात्।२६। अस्य जिह्वा सहृत् खे चरति। विष+आर्ति+रुक्+जरा+क्षुत्+तृट्+निद्रा+तंद्रा+मृति+क्रियाः कदा अपि नो स्पृशन्ति।२७। स्त्री+आश्लेषितस्य अपि बिन्दुः न क्षरति, सः ऊर्ध्वं एति। चलितः चेत् योनि+मुद्रा+बद्धः सः भोगी अपि मुक्तः।२८।

आकुंचन करून लगेच भस्रा करावी. याने कुंडलिनी शक्ती विचलित होते. धैर्याने अर्धा प्रहर अभ्यास केल्यावर सुषुम्णेत प्रवेशलेली(२१) शक्ती थोडीशी वर खेचली जाते आणि सुषुम्णेचे मुख सोडून प्राणाला वाट करून देते. मग प्राण आपोआपच वर ब्रह्मरंध्राकडे जाऊ लागतो. याकरिता शक्तीला विचलित करायला पाहिजे.२२. शक्तिचालनाच्या अभ्यासाने एका मंडलात (४० दिवस) योग्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. रोगाचेच काय, पण मृत्यूचेही भय उरत नाही. शक्तिचालनासारखा दुसरा नाडीशुद्धीचा उपाय नाही. शक्तिचालनाला कुंडलिनीचे जागरण असेही म्हणतात.२३.

शक्तीचे चालन झाल्यावर ती सुषुम्णेतून वर चढवायची असते. जिह्वा जर खेचरी मुद्रेने बांधली तर शक्ती अधिक सुखाने ब्रह्मरंध्राकडे जाते. प्राणाची गती सहस्रार चक्राकडे झाली की राजयोग सिद्ध होतो आणि साधकाला अणिमादि सिद्धींची प्राप्ती होते.२४. ही खेचरी मुद्रा सिद्ध करण्यासाठी प्रथम जीभेच्या मुळाशी असलेली शीर कापून ती मोकळी

**सुधान्तःस्रवतीन्दोस्तां ग्रसत्यर्कस्ततो जरा । अधःशीर्षोर्ध्वपात्तिष्ठेद् बह्वाहारः शनैः शनैः ।।२९।।**
**याममात्रं ततः सिद्धिर्व्यस्तेयं करणीष्टदा । वलीपलितवेपघ्नी मृत्युहर्त्री सुधाप्रदा ।।३०।।**

इन्दोः सुधा अन्तः स्रवति। तां अर्कः ग्रसति। ततः जरा। अधः+शीर्षः ऊर्ध्व+पात् तिष्ठेत्। शनैः शनैः बहु+आहारः।२९। ततः याम+मात्रं सिद्धिः। इयं इष्ट+दा वली+पलित+वेप+घ्नी मृत्यु+हर्त्रा सुधाप्रदा व्यस्ता करणी।३०।

करायला हवी. हे छेदन अगदी काळजीपूर्वक थोडे थोडे करावे लागते. प्रथम ती शीर निवडुंगाच्या पानासारख्या शस्त्राने अगदी केसभर कापावी आणि हिरडा आणि शेंदीलोण यांचे मिश्रण तिथे चोळावे. यानंतर जीभ शिरेपासून सोडविण्यासाठी आणि लांब करण्यासाठी तिचे चालन आणि दोहन करावे. म्हणजे ती दोन्ही हातांचे अंगठे आणि बोटांनी धरून पुढे-मागे आणि डावी-उजवीकडे ओढून लांबवावी आणि शिरेपासून सुटी करावी. सात दिवसांनी पुन्हा तशीच केसभर कापून पूर्वीप्रमाणेच दोहन-चालनादि करावेत.२५. अशा रीतीने अभ्यास केल्याने सहा महिन्यांत जिभेच्या..

..खालचा शिराबंध पूर्ण सुटतो. तसेच जीभेची लांबी इतकी होते की ती बाहेर काढून तिचा शेंडा भ्रूमध्याला लावता येतो. आता ही जीभ उलटी फिरवून पडजिभेच्या वरच्या छिद्रांतून भ्रूमध्याच्या आतल्या भागाला टेकवली की खेचरी मुद्रा सिद्ध होते.२६. ह्या मुद्रेत साधकाची जिह्वा मनासह आकाशांत जाते (*खे चरति*) म्हणून तिला खेचरी म्हणतात. हिचे फळ असे आहे की त्या योग्याला विषबाधा, रोग, वार्धक्य, तहान, भूक, निद्रा, तंद्रा, मृत्यू कधीही स्पर्श करीत नाहीत.२७. अशा योग्याचे वीर्य स्त्रीच्या आलिंगनानेही स्खलित होत नाही. आणि स्खलन झाले तरीही तो योनी (वज्रोली) मुद्रेच्या अभ्यासाने वर खेचू शकतो. योगशास्त्राच्या सिद्धांतानुसार हे वर ओढलेले शुक्ल वीर्य शिवणीच्या आंतल्या योनिस्थानांतील पोवळ्यासारख्या रक्त वीर्याशी संयुक्त होते आणि त्याचे ओजात रूपांतर होऊन ते सुषुम्णेतून सहस्रार चक्राकडे जाते. असा योगी भोगी असला तरी तो मुक्तच असतो.२८.

**स्वास्येऽग्नौ दीप्तेऽङ्गसादे नाडीशुद्धावनामये । नादस्फुटत्वे सुदृष्ट्याः सिद्धिर्बिन्दौ जिते सति ।।३१।।**
**विविधा उपसर्गाः प्राक् संभवन्त्यत्र योगिनः । सद्गुरोर्दृढभक्त्या ते प्रणश्यन्ति न चान्यथा ।।३२।।**
**कारणं कर्मारुरुक्षोर्योगिनो योगमुत्तमम् । शमः कारणमस्याग्रे योगारूढस्य योगिनः ।।३३।।**
**कामवेगसहोऽन्तर्दृक् सुखारामोऽभितो यतिः । ब्रह्मनिर्वाणमेत्येव ब्रह्मभूतोऽमलः समः ।।३४।।**

सु+आस्ये, अग्नौ दीप्ते, अङ्गसादे, नाडी+शुद्धौ, अनामये, नाद+स्फुटत्वे, सु+दृष्ट्या, बिन्दौ जिते सति सिद्धिः।३१। प्राक् योगिनः विविधा उपसर्गाः संभवन्ति। ते सत्+गुरोः दृढ+भक्त्या प्रणश्यन्ति। अन्यथा च न।३२। उत्तमं योगं आरुरुक्षोः योगिनः कर्म कारणम्। अस्य योग+आरूढस्य योगिनः अग्रे शमः कारणम्।३३। काम+वेग+सहः अन्तः+दृक् अभितः सुख+आरामः ब्रह्मभूतः समः यतिः ब्रह्म+निर्वाणं एति एव।३४।

टाळूच्या आतील चंद्रापासून अमृतस्राव होत असतो. पण बेंबीच्या आतील सूर्य ते खाऊन टाकतो. हेच वार्धक्याचे कारण आहे. या अमृताचेच पान खेचरी मुद्रेने योगी करत असतो. हे अमृत सूर्यापासून राखून पान करण्यासाठी खाली डोके आणि वर पाय अशा स्थितीत राहावे. याने हळूहळू आहार वाढत जातो. म्हणून या मुद्रेचा अभ्यास करताना आहार भरपूर घ्यावा. आरंभी क्षणभर अभ्यास करून तो हळूहळू वाढवीत एक प्रहर (तीन तास) झाला की ही विपरीतकरणी मुद्रा सिद्ध होते. अमृताचा लाभ करून देऊन, अंगावर सुरुकत्या, अकाली केस पांढरे होणे, कंप यांना दूर करून ही मृत्यूला दूर करणारी आहे.२९.

इथे हठयोगाचे निरूपण पूर्ण होते. त्या योगाचे फळ या श्लोकात सांगितले आहे. कांतियुक्त मुख, जठराग्नीचे प्रदीपन, शरीराचे कार्श्य, नाड्यांची शुद्धी, निरोगता, अनाहत नादाचे प्राकट्य, निर्दोष दृष्टी आणि बिंदुजय ही हठयोगाच्या सिद्धीची आठ लक्षणे जाणावीत.३१. पण या सिद्धीच्या मार्गात अनेक विघ्ने आहेत ही सावधानतेची सूचना श्रीस्वामिमहाराज करीत आहेत. पतंजलींनी योगसूत्रांत (१:३०) व्याधि, स्त्यान, आलस्य, अविरति, भ्रान्तिदर्शन,

**कश्चिद्धारणयोपास्ते ध्यानात्कश्चित् समाधिना । आत्मानमेवमाप्त्वेमां सिद्धिं मुक्तो भवत्यसौ ।।३५।।**
**हृद्युपास्यो धारणया वराभयकरो हरिः । प्रादेशमात्रः सुसिद्धः खेचरीमुद्रया युतः ।।३६।।**
**अङ्गुष्ठमात्रं पुरुषं दत्तात्रेयं दिगम्बरम् । ध्यायेत्सिद्धासनासीनं द्युनिशं कण्ठसंस्थितम् ।।३७।।**

कश्चित् धारणया उपास्ते, (कश्चित्) ध्यानात् (उपास्ते), कश्चित् समाधिना (उपास्ते)।३५। प्रादेश+मात्रः वर+अभय+करः सुसिद्धः खेचरी+मुद्रया युतः हरिः हृदि धारणया उपास्यः।३६। अङ्गुष्ठ+मात्रं दिगंबरम् सिद्ध+आसीनं पुरुषं दत्तात्रेयं कण्ठ+संस्थितं द्यु+निशं ध्यायेत्।३७।

अलब्धभूमिकत्व इत्यादि अंतराय सांगितले आहेत. योगशास्त्रातील ग्रंथांत आणि मार्कंडेयादि पुराणांतही त्यांचे सविस्तर वर्णन आहे. श्रीमहाराजांच्या मते ह्या सर्व विघ्नांवर सद्गुरूंची दृढ भक्ती हाच एकमेव उपाय आहे. पतंजलींनीही सर्व गुरूंचाही गुरू जो परमेश्वर, त्याच्या वाचकाच्या - प्रणवाच्या किंवा नामाच्या जपाने अंतरायांचा अभाव होतो (१:२९) असे सांगितले आहे.३२. तेहतिसावा श्लोक भगवद्गीतेतील श्लोकाचा (६:३) अनुवादच आहे. योगाची सिद्धी पावण्यासाठी कर्म हेच साधन आहे. योग सिद्ध झाल्यावर त्या योग्याने कर्माचा त्याग करून - संन्यास घेऊन शमदमादींचा - उपलक्षणाने ज्ञानयोगाचा, अभ्यास करावा. असा थोडक्यात अभिप्राय आहे. श्रीमच्छंकराचार्यांनी या..

..श्लोकाच्या टीकेत स्पष्ट केल्याप्रमाणे, निष्काम कर्मयोग हे ध्यानयोगाचे साधन आहे असे म्हटले आहे. आतापर्यंत पाहिलेला हठयोग हा कर्मयोगातच अंतर्भूत आहे. कर्मयोगाने शुद्ध झालेले चित्त समाधानरूपी योगात स्थिरावते. ते चित्त जसे जसे स्थिर होईल तसा तसा योगी कर्मापासून निवृत्त होत जाईल.३३.

**प्रत्याहार - अन्तर्दृक्** म्हणजे ज्याची दृष्टी आदि इन्द्रिये बाह्य विषयाना सोडून आत वळली आहेत. ज्याची इंद्रिये कासवाच्या अवयवांप्रमाणे विषयांपासून आत ओढली जातात त्याची प्रज्ञा स्थिर होते, असे भगवद्गीतेत प्रत्याहाराचे (२:५८) वर्णन आहे.

**सहस्रदलपद्मस्थं सुसूक्ष्मं शान्तमुज्ज्वलम् । समाधिना द्वादशाहं तन्मयो भावयेत्परम् ।।३८।।**

सहस्र+दल+पद्म+स्थं शांतं उज्ज्वलं सुसूक्ष्मं परं तत्+मयः समाधिना द्वादश+अहं भावयेत्।३८।

त्यामुळेच तो कामाचा वेग सहन करू शकतो. भगवद्गीतेत (५:२३) सांगितल्याप्रमाणे जिवंतपणीच कामक्रोधांचे वेग सहन करणाराच योगी व सुखी होतो. तसेच बुद्धिग्राह्य अतींद्रिय सुखांत (६:२१) तो रमलेला असतो. 'मग जे जे कां निमिख। देखेल माझे सुख। तेतुलेनि अरोचक। विषयीं घेईल।।१२:१०६।।' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे प्रत्याहार आणि आंतरिक सुख आणि हे परस्परसंवर्धक आहेत. या अभ्यासानेच योगी चित्ताचे सर्व मल दूर करून ब्रह्मरूप होऊन ब्रह्मनिर्वाण पावतो. तो सम म्हणजे सुदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जातो. **यतिः** या शब्दाने ही अवस्था दुर्लभ आहे.३४.

कुणी धारणेच्या अभ्यासाने, कुणी ध्यानाने तर कुणा समाधीने आत्म्याची उपासना करतात आणि ही सिद्धी प्राप्त करून मुक्त होतात. आता पुढील एकेका श्लोकाने धारणा, ध्यान आणि समाधी ह्यांचे वर्णन केले आहे.३५.

**धारणा -** पतंजलींच्या मते (३:१) मनाला एका देशात बांधणे म्हणजे धारणा (*देशबन्धश्चित्तस्य धारणा।*). बाहेरच्या किंवा शरीरांतर्गत आलंबनावर चित्त स्थिर करून ठेणे हे धारणेचे लक्षण आहे. गरुडपुराणात धारणेला उपयुक्त असे दहा देश सांगितले आहेत. नाभी, हृदय, छाती, गळा, तोंड, नेत्र, भ्रूमध्य, टाळू आणि त्याच्या थोडा वरचा देश. विष्णुपुराणात भगवंताच्या सगुण मूर्तीवरही धारणा करता येते. '*मूर्तं भगवतो रूपं सर्वोपाश्रयनिःस्पृहम्। एषा वै धारणा ज्ञेया यच्चित्तं तत्र धार्यते।।*' या श्लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी हृदयाच्या देशात, अनाहत चक्रात, एक वीतभर उंचीच्या वर आणि अभय मुद्रा दाखविणाऱ्या, खेचरी मुद्रेने युक्त अशा पापतापहर दत्तप्रभूंची धारणा करायला सांगितली आहे. ही धारणा अशी केली पाहिजे की संसारांतील कर्तव्ये करतांनाही चित्त तिथून ढळायला नको. धारणेची एक व्याख्या अशी आहे की वृत्ती त्यांत ध्येयाकार होते; पण त्यांत इतर वृत्ती आणि व्यवधान येत राहते. म्हणजेच धारणेतील चित्ताची एकाग्रता ही विच्छिन्न असते.३६.

**अन्तर्लीनसहृत्प्राणो पश्यन्नचलदृग्बहिः । मुद्रेयं शाम्भवी शून्याशून्यलक्ष्मपदप्रदा ।।३९।।**

अचल+दृक् बहिः पश्यन् अन्तः+लीन+सहृत्+प्राणः। इयं शून्य+अशून्य+लक्ष्म+प्रदा शाम्भवी मुद्रा।३९।

**ध्यान -** पुढच्या श्लोकांत ध्यान सांगितले आहे. पतंजलींनी म्हटले आहे, '*तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्।*' ध्यानात ध्येयाकार झालेली वृत्ती अविच्छिन्न आहे. चित्त अखंड तेलाच्या धारेसारखे ध्येयाकडे प्रवाहित होणे, त्यात कसलीही दुसरी वृत्ती न उठणे हे ध्यानाचे लक्षण आहे. इथे श्रीस्वामिमहाराजांनी कंठामध्ये अंगठ्याएवढ्या, सिद्धासनस्थ, दिगंबर पुरुषाचे ध्यान करायला सांगितले आहे. चित्त एक दिवस व एक रात्र (२४ तास) असे स्थिर झाले की ध्यान सिद्ध होते. मागच्या श्लोकांत वीतभर मूर्तीचे ध्यान सांगितले. आता अंगठाभर रूपाचे सांगत आहेत. याचाच अर्थ आलंबन अधिकाधिक सूक्ष्म करायचे आहे.३७.

**समाधी -** ध्यान सिद्ध झाले की समाधीचा अभ्यास करावा. समाधीचा विषय अत्यंत सूक्ष्म, शांत, तेजोमय भगवत्स्वरूप असून स्थान ब्रह्मरंध्रातील सहस्रदलपद्म आहे. ध्यान जेव्हा इतके प्रगाढ होते की योग्याची जाणीव नाहीशी होते. फक्त ध्येयाचेच भान शिल्लक राहते. *तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः।* (योगसूत्र ३:३). समाधीचा काळ बारा दिवसांचा आहे. *अवध्यः सर्वशस्त्राणामशक्यः सर्वदेहिनाम्। अग्राह्यो मंत्रयंत्राणां योगी मुक्तः समाधिना।।* (हठयोगप्रदीपिका ४:११३) समाधी सिद्ध झालेल्या योग्याचा कोणत्याही शस्त्राने वध होत नाही; कुणाही देहधारी जीवाकडून त्याचा पराभव होऊ शकत नाही. मंत्र किंवा यंत्रांचा त्याच्यावर प्रभाव पडत नाही.३८.

**शांभवी मुद्रा -** प्राण आणि मन अंतराकाशांत लीन असतांना निमेषोन्मेषरहित उघडे डोळे मात्र कांहीच न पाहता बाहेर लागलेले आहेत. अशी शून्य आणि अशून्य परमात्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारी शांभवी मुद्रा आहे. **शं** म्हणजे सुख ज्या मुद्रेने होते **भ**वति ती **शांभवी**. **मुत्** अर्थात् निर्विकल्प आनंद - **रा**ति - देणारी, ती **मुद्रा**.

**तद्वान् दृढासनो दक्ष-कर्णे रुद्धबिलो ध्वनिम् । त्रिग्रन्थिभेदं शृणुयात् सुसूक्ष्मं स समाधिभाक् ।।४०।।**
**यमेन दशधा नूनं दशधा नियमेन च । आसनाद्येन षट्केन योगोऽष्टाङ्गोऽयमुच्यते ।।४१।।**

तत्+वान् दृढ+आसनः रुद्ध+बिलः त्रि+ग्रन्थि+भेदं सुसूक्ष्मं ध्वनिं शृणुयात्। सः समाधि+भाक्।४०। दशधा यमेन, दशधा नियमेन च, एन आसनादि षट्केन नूनं अयं अष्ट+अङ्गः योगः उच्यते।४१।

**शून्य** म्हणजे देहादि उपाधिरहित; आणि **अशून्य** म्हणजे निषेधाच्याही अतीत ह्या लक्षणांचे योग्यांनाच गमणारे (*गम्यते अनेन*) **पद** पावविणारी ही मुद्रा आहे. हठयोगप्रदीपिकेत हिचे असे वर्णन आहे, '*अंतर्लक्ष्यं बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता। एषा सा शांभवीमुद्रा वेदशास्त्रेषु गोपिता।।*' (४।३६) भ.पू.पा. शंकराचार्य योगतारावलीत म्हणतात. *नेत्रे ययोन्मेषनिमेषशून्ये वायुर्यया वर्जितरेचपूरः। मनश्च संकल्पविकल्पशून्यं मनोन्मनी सा मयि सन्निधत्ताम*।।१७।।. या श्लोकात या मुद्रेला मनोन्मनी आणि पुढे २१व्या श्लोकात अमनस्क मुद्रा असे तिलाच म्हणले आहे.३९.

**नादानुसंधान -** ही शांभवी मुद्रा लावून दृढ आसनावर बसून, दोन्ही अंगठ्यांनी कान, तर्जनींनी डोळे, मधल्या बोटांनी आणि उरलेल्या बोटांनी तोंड ही बिळे बंद केल्याने, उजव्या कानात नाद ऐकायला येतात. त्यांवर लक्ष केंद्रित केल्याने समाधीचा लाभ होतो. या नादांच्या *आरंभ*, घट, परिचय आणि निष्पत्ती अशा चार अवस्था हठयोगप्रदीपिकेच्या ४थ्या उपदेशात सांगितल्या आहेत. येथे श्रीस्वामिमहाराजांनी त्याचाच निर्देश केला आहे.

**त्रिग्रंथिभेदं -** प्रथम अनाहत चक्रातील रजोगुणात्मक ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हा सुषुम्णेत भूषणांच्या रुणझुणीसारखे नाद ऐकायला येतात. ही आरंभ अवस्था होय. या अवस्थेत कामक्रोधादि राजस भावांचा उपशम होतो. योग्याचे साधन प्रगत झाल्यावर जेव्हा प्राण कंठातील **विष्णुग्रंथी**चा भेद करतो तेव्हा भेरीसारखा आवाज उजव्या कानात ऐकायला येतो. हीच *घटावस्था.* यानंतर प्राण भ्रूमध्यात स्थिरावून तेथील रुद्रग्रंथीचा भेद करतो तेव्हा विशिष्ट वाद्याचा

**एतेनाष्टाङ्गयोगेन प्रबुद्धः स्वल्पसंविदा । शुभाशुभविनिर्मुक्तो देही ब्रह्ममयो भवेत् ।।४२।।**

एतेन स्वल्प+संविदा अष्ट+अङ्ग+योगेन प्रबुद्धः शुभ+अशुभ+विनर्मुक्तः देही ब्रह्म+मयः भवेत्।४२।

ध्वनी ऐकायला येतो. मग चित्तवृत्तीरूप आनंद मावळून स्वाभाविक आत्मानंद प्रकट होतो. ही तिसरी *परिचयावस्था.* तो या अवस्थेत योगी भूक, तहान, झोप, त्रिदोषजन्य दुःखे यांपासून मुक्त होतो. चौथ्या *निष्पत्ती* अवस्थेत प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिर होतो आणि बासरीच्या आवाजासारखा नाद उजव्या कानात ऐकायला येतो. हीच निष्पत्ती अवस्था. ह्यालाच राजयोग असे म्हणतात. या अवस्थेला पोचलेल्या योग्याला जगाची उत्पत्ती आणि लय करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. भ.पू.पा. शंकराचार्यांनी नादानुसंधानाने होणाऱ्या चित्ताच्या लयाला सर्वश्रेष्ठ लय मानले आहे. (*सदाशिवोक्तानि सपादलक्षलयावधानानि वसन्ति लोके। नादानुसंधानसमाधिमेकं मन्यामहे मान्यतमं लयानाम्।* योगतारावली ४)४०.

**अष्टांगयोग -** आतांपर्यंतच्या विवेचनांत श्रीमहाराजांनी आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही सहाच अंगे (**षट्क**) सांगितली आहेत. आता आणखी दोन अंगांचा विचार करून अष्टांगयोग संपूर्ण केला आहे. दहा प्रकारचा यम आणि दहा प्रकारचे नियम ही ती दोन अंगे. योगशास्त्रानुसार ते पुढीलप्रमाणे आहेत.

*अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः। दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश।*
*तपः संतोष आस्तिक्यं दानमीश्वरपूजनम्। सिद्धांतवाक्यश्रवणम् ह्रीमती च तपो हुतम्।*
*नियमा दश संप्रोक्ता योगशास्त्रविशारदैः।।*

पातंजल योगसूत्रात यम आणि नियम प्रत्येकी पाचच सांगितले आहेत. शांडिल्यादि इतर योगशास्त्रकारांनी आणि पुराणातही त्यांची संख्या वरीलप्रमाणे दहा दहा सांगितली आहे. यम हे दोषांपासून दूर राहण्यासाठी आहेत तर नियम हे गुणरूप आहेत. हे सामान्य मानव धर्माचे अंगभूत असल्याने कुणी कुणी यांना योगाची अंगे न मानता योगाला षडंगच म्हणतात.

**इदं रहस्यं परमं नाख्येयं यस्य कस्यचित् ।।४३।।**

**।। इति योगाख्यं प्रथमं रहस्यम् ।।**

इदं परमं रहस्यम्। यस्य कस्यचित् न आख्येयम्।४३।

अर्थात् हे यमनियम योगाभ्यासाचा पायाच आहेत. योगाच्या सिद्धीनंतरही लोकसंग्रहासाठी यांचे अनुष्ठान आवश्यकच ठरते.४१. या स्वल्प म्हणजे सूक्ष्मस्वरूप परमेश्वराचे ज्ञान करून देणाऱ्या अष्टांगयोगाने ऐतरेय उपनिषदांत (१:३:१३) सांगितल्याप्रमाणे 'तोच हा पुरुष, ब्रह्म जीवमात्रांत व्याप्त आहे.' अशा ज्ञानाने प्रबुद्ध झालेला जीव शुभ आणि शुभ यांच्यापासून मुक्त होऊन ब्रह्मरूप होतो.४२.

**रहस्य -** ह्या अर्ध्या श्लोकात ग्रंथकारांनी हे रहस्य आहे आणि अनधिकारी माणसाला सांगू नये. असा आदेश दिला आहे. भगवद्गीतेतही (१८:६४) 'अर्जुना हे सर्व गुह्यांत गुह्यतम मी तुला सांगतो आहे.' असे स्पष्ट करून ते 'कधीही तपरहित, भक्तिहीन, सेवापराङ्मुख आणि परमेश्वराविषयी दोषदृष्टी ठेवणाऱ्याला सांगू नये' (६७) असा दंडक घातला आहे. हे सर्वच आध्यात्मिक ग्रंथांना लागू आहेच. इथे आणखी एक सूचना पुनरुक्तीचा दोष घेऊन करावीशी वाटते की हा ग्रंथ जिज्ञासूंना योगाची अंशतः तरी माहिती व्हावी या लोककल्याणाच्या भावनेने केला आहे. ह्यांत योगाची अनेक रहस्ये गुप्तच ठेवण्यात आलेली आहेत.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील योगरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ बोधरहस्यम् ।।

**सन्तप्त धन्य संन्यासिन् गुरुभक्त गतागतात् । मुक्त्या आत्माप्तये तत्त्व-जडचैतन्यविद्भव ।।१।।**

संतप्त धन्य संन्यासिन् गुरु+भक्त गत+आगतात् आत्म+आप्तये मुक्त्यै तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव।१।

श्रीगणेशाय नमः। कठोपनिषदांत (२:१:१) इंद्रिये बहिर्गामी असल्याने ती अंतरात्म्याला पाहू शकत नाहीत; त्यासाठी त्यांना आत वळवून मोक्षाच्या इच्छेने प्रत्यगात्म्याला एकादाच धीर पुरुष पाहतो (*कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्*). याचे दिग्दर्शन योगरहस्यात करून आता तिथेच (१:२:९) पुढे सांगितलेल्या 'ते दुसऱ्याकडूनच जाणून चांगले समजते' (*प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ*) या श्रुतिवाक्याचा भावार्थ व्यक्त करण्यासाठी हे बोधरहस्य केले आहे. योगरहस्यात सांगितल्याप्रमाणे योगाने मन-पवनांना स्थिर केल्यावर करावयाचा चित्ताच्या उपशमाचा, म्हणजेच आत्मज्ञानाचा अभ्यास बोधरहस्यात सांगितला आहे. बोध म्हणजेच ज्ञान आणि ज्ञानानेच मोक्ष म्हणजे निरतिशय आनंद - ज्यात सर्व दुःखांचा आत्यंतिक निरास अंतर्भूत आहे. हा सूत्रात्मक ग्रंथ श्रीस्वामिमहाराजांनी गुरु-शिष्यसंवादाच्या रूपात मांडलेला आहे. संवादात गुरुमहाराजच सांगत आहेत. शिष्याचे प्रश्न अपेक्षित किंवा अध्याहृत आहेत.

कुणी एक सुसंस्कृत ब्राह्मण वेदाध्ययन करून, गृहस्थाश्रमात विहित कर्मांचे आचरण करून आपल्या चित्तातील मलांचा निरास करून, परमेश्वराची उपासनाही करून दैवयोगाने त्रिविध तापांनी **संतप्त** होऊन वैराग्याने श्रीगुरूंना शरण आला. त्याची ती अवस्था पाहून कृपाळू भगवान् श्रीगुरू त्याला विचारीत आहेत.

**अधिकार -** पहिल्या श्लोकात शिष्याला उद्देशून चार संबोधने आहेत. त्या संबोधनांतून हा बोध घेण्याला शिष्य कसा योग्य आहे ते स्पष्ट होते. पहिले संबोधन आहे, '**संतप्त**'! म्हणजेच संसारांतल्या आध्यात्मिक, आधिभौतिक

आणि आधिदैविक अशा तीन प्रकारच्या तापांनी होरपळलेला! (आध्यात्मिक म्हणजे स्थूल शरीरातच निर्माण होणारी व्याध्यादि पीडा, व सूक्ष्म शरीरात होणारी दंभ-मद-मानादि आंतरपीडा, आधिभौतिक म्हणजे स्वशरीराहून भिन्न असणाऱ्या, प्रत्यक्ष परिदृश्यमानच चराचर जगापासून होणारी पीडा व आधिदैविक म्हणजे चर्मचक्षूला अदृश्य असणाऱ्या भूतप्रेतपिशाच प्रभृति शक्तींपासून होणारी पीडा.) अर्थातच ह्या संसाराच्या दुःखमयतेची खात्री पटलेला आणि त्यामुळे संसाराला उबगलेला. संसारातील सुखे कशी फसवी, क्षणभंगुर आणि दुःखपर्यवसायी आहेत हे मनांत बिंबल्याने ऐहिक किंवा पारलौकिक अशा सर्व सुखांच्या भोगांचा तिटकारा म्हणजेच वैराग्य (*इहामुत्रफलभोगविरागः*) उपजलेला. या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात सांगितलेला '*भवभ्रष्टमना*'. हा संसाराचा उबग किंवा वैराग्य हे कांही पूर्वपुण्याईवाचून येत नाही. याचा सविस्तर विचार योगवासिष्ठांत वैराग्य प्रकरणात पाहावा. अर्थातच ह्या वैराग्यावरून त्याची **धन्य**ता सिद्ध होते. हे वैराग्य हे ज्ञानाच्या चार साधनांचे उपलक्षण जाणावे. (साधनचतुष्टय - १. वैराग्य, २. विवेक, ३. शम-दम-श्रद्धा-तितिक्षा-उपरती-समाधान ही षट्संपत्ती आणि ४. तीव्र मुमुक्षा) गुरुमहाराज त्याला (हे) **संन्यासिन्** असे म्हणत आहेत. याचा अर्थ हा बोध घेणारा शिष्य संन्यासी असला पाहिजे. मग तो '*काम्यानां कर्मणां न्यासम्*' असा विद्वत्संन्यास असो की विविदिषा प्राप्तीनंतर घेतलेला विधिपूर्वक संन्यास असो.

पुढचे संबोधन **गुरुभक्त** असे आहे. सर्व जीवमात्रांत गुढरूपाने अवस्थित असणाऱ्या, मात्र गंभीर, अनिर्वचनीय आणि दुस्तर मायेच्या प्रभावाने अनुभवाला न येणाऱ्या परमाणूपेक्षाही सूक्ष्म आत्म्याचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर आपल्या बुद्धीनेच तर्क करून ते होणार नाही. ते दुसऱ्या ज्ञानी पुरुषांकडूनच मिळवावे लागते (कठ उ.२:९). श्रीमद्भागवतांत (११:३:२२) '*शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्*' अर्थात् ज्याला आत्म्याचे शाब्द - परोक्ष ज्ञानही आहे, जो साक्षात्कारी आहे आणि जो आत्मानंदातच रमलेला आहे अशा गुरूंकडूनच आत्मज्ञान प्राप्त होते. अशाच आत्मज्ञानी पुरुषांना संत म्हणतात. श्रीमदादिशंकराचार्य त्यांच्याविषयीच म्हणतात, '*शान्ता महान्ताः निवसन्ति संताः*

**स्वान्याज्ञं जडमन्या चिन्नामरूपात्मकं जडम् । रोमत्वङ्मांसनाड्यस्थि भुवोऽद्भ्यो मूत्ररेतसी ।।२।।**

स्वान्याज्ञं जडं (ज्ञेयम्) अन्या चित् (ज्ञेया) नामरूपात्मकं जडम्। रोमत्वङ्मांसास्थि भुवः (भवन्ति) मूत्ररेतसी स्वेदः अस्त्र+लाले च अद्भ्यः (भवन्ति)।२।

*वसंतवल्लोकहितं चरन्तः।*' परमार्थात सद्गुरूंच्या अनिवार्यतेची ग्वाही देणाऱ्या श्रुती, स्मृती, पुराणवचने आणि संतवचने किती तरी आहेत. अशा सद्गुरूंना शरण जाऊन त्यांचा आदर करून, त्यांची सेवा करून, त्यांना जिज्ञासू भावाने प्रश्न केल्यावर ते ज्ञानाचा उपदेश करतात असे भ.गीतेचेही वचन आहे (*तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः*।।४.३४।।). केवळ गुरूंकडे जाऊन काम होत नाही तर त्यांना शरण जाऊन त्यांची भक्ती केली पाहिजे असा अभिप्राय आहे. श्वेताश्वतर उपनिषदानुसार ज्याची देवावर भक्ती आहे, आणि देवासारखीच गुरूवरही भक्ती आहे त्या महात्म्याच्याच चित्तात हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील (*यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्येते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः*।।६.२३।।). भगवद्गीतेतही हे ज्ञान अभक्ताला सांगू नये असे म्हटले आहे.

**प्रयोजन -** अशा रीतीने ह्या चार संबोधनांतून त्या शिष्याने आत्मज्ञानप्राप्तीचा अधिकार संपादन केला आहे असे सूचित केल्यावर ग्रंथाचे प्रयोजन '**आत्म+आप्तये मुक्त्यै**' या शब्दांत सांगितले आहे. आत्म्याची प्राप्ती करून घेऊन जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे. शेवटी '**तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव**' या पदातून ह्या ग्रंथाचा विषय स्पष्ट केला आहे. इथे तत्त्वे म्हणजे सांख्ययोगातील प्रतिपादित तत्त्वे. यांची संख्या २५ असून पुढच्या साडेतीन श्लोकांत ती सांगितली आहेत. ह्या तत्त्वांचा अंतर्भाव जडातच होतो हे पुढे स्पष्ट करतील. ही तत्त्वे आणि जड काय आणि चैतन्य काय हे जाणणाराच आत्मज्ञान प्राप्त करून मुक्त होतो.१.

**स्वेदोऽस्रलालेग्नेः क्षुत्तृण्-निद्रा तन्द्रा रतिर्गतिः । लौल्यं निरोधः प्रसाराकुञ्चने मरुतोऽथ खात् ।।३।।**

(स्वेदः, अस्त्र+लाले (भवंति)) अग्नेः (सकाशात्) क्षुत्-तृट्-निद्रा-तंद्रा-रतिः (भवंति) मरुतः (सकाशात्) गतिः+लौल्यं+निरोधः प्रसार+आकुंचने (भवंति)। अथ खात्।३।

**जड -** प्रथम जडाची व्याख्या केली आहे. स्वतःला किंवा इतरांना जे जाणत नाही (**स्व+अन्य+अज्ञं**) ते जड. म्हणजे जाणीवरहित घटपटादि वस्तू म्हणजे जड. यापेक्षा वेगळे जाणीव असणारे ते चेतन (conscious) (**अन्या चित्**). जड हे दृश्य आहे तर चेतन ही दृक् (दृष्टी) आहे. तू, मी, असा प्रत्यय ज्याला येतो तो चेतन पदार्थ आहे. जड हे विषय आहेत तर चेतन विषयी आहे. जगात हेच दोन पदार्थ आहेत. चेतन पदार्थ मुख्य आहे व जड पदार्थ गौण आहेत. चेतन पदार्थ स्वतःसाठी (स्वार्थ) आहे व जड पदार्थ दुसऱ्यासाठी (परार्थ). असे हे जड आणि चेतन पदार्थ प्रकाश आणि अंधाराप्रमाणे परस्परविरुद्ध आहेत. जड वस्तू ह्या चेतनासाठी आहेत. जड हे नामरूपात्मक आहे हा दुसरा सिद्धांत आहे. याचाच अर्थ चेतन हे नामरूपातीत आहे.

आता आपल्याला चेतन वाटत असलेला हा देह हा कसा जड किंवा अचेतन आहे ते सांगत आहेत. त्यासाठी तो कसा पंचमहाभूतांचा बनलेला आहे त्याचे वर्णन केले आहे. प्रथम स्थूल देहाचे किंवा अन्नमय कोशाचे वर्णन आहे.

**पृथ्वी** या भूतापासून रोम, त्वचा, मांस, नाड्या आणि अस्थी झाल्या आहेत. हे पाच पदार्थ पृथ्वीसारखे कठीण आहेत. **जला**पासून मूत्र, वीर्य, घाम, रक्त आणि लाळ हे पाच पातळ, प्रवाही पदार्थ झालेले आहेत.२. **अग्नी**पासून क्षुधा, तृषा, निद्रा, तंद्रा (आळस) आणि रती म्हणजे मैथुन किंवा कांती. **वायू**पासून गती (हालचाल), निरोध, चांचल्य, प्रसरण, आकुंचन हे पाच होतात. **आकाशा**पासून(३) काम, क्रोध, लोभ, लोभ आणि भीती हे पाच.

**कामक्रुड्लोभमोहाभीस्-तदाढ्येयं जडा तनुः । वर्णाश्रमादिद्वन्द्वादि-संबन्धादिपरो भवान् ।।४।।**
**यन्निर्विकल्पं स्फुरति तदन्तःकरणं मनः । तत्सङ्कल्पविकल्पाभ्यां तत्तु धीर्निश्चयात्मकम् ।।५।।**

काम-क्रुड्-लोभ-मोहा+भीः (भवंति) तत्+आढ्या इयं जडा तनुः (अस्ति) भवान् वर्ण+आश्रमादि द्वंद्वादि संबन्धादि परः (अस्ति)।४।
- यन्निर्विकल्पं स्फुरति तत् अन्तःकरणम्। यत् संकल्प+विकल्पाभ्यां (उपलक्षितं) तन्मनः। यत्+निश्चय+आत्मकं तत्+चित्तम्।५।

अशा ह्या पाच भूतांच्या अंशापासून झालेल्या पंचवीस तत्त्वांचा हा जड किंवा स्थूल देह बनलेला आहे. वर्ण, आश्रम इत्यादि, तसेच सुख-दुःखादि द्वंद्वे, पिता, पुत्र इत्यादि संबंध हे या स्थूलदेहालाच आहेत. तू (या बोधरहस्यांत शिष्याला 'आपण' हे बहुमानार्थी संबोधनच वापरले आहे) यांच्या पलीकडे आहेस.४. तहान-भूक आदि प्राणाचे धर्म आणि काम-क्रोधादि मनाचे धर्म वर स्थूलदेहाच्या निरूपणांत आले आहे त्याचा अर्थ त्यांचे स्थूल देहावर होणारे परिणाम असा घ्यावा.

**सूक्ष्म देह -** 'मग ही सुख-दुखांची अनुभूती कुठून येते' याचे उत्तर साक्षी असा जो प्रत्यगात्मा त्याचे अंतःकरणाशी तसेच त्या अंतःकरणाचे स्थूल देहाशी झालेले तादात्म्य हेच आहे. त्या परस्परदेहांच्या तादात्म्यानेच सुख-दुःखांचे आभास होतात हे स्पष्ट करण्यासाठी प्रथम ते अंतःकरण वृत्तींसह सांगितले आहे. तूष्णी किंवा तटस्थ (आपण ज्याला सुन्न किंवा बधीर म्हणतो त्या) अवस्थेत किंवा समाधी अवस्थेत जे वृत्तीरहित स्फुरण होते ते **अंतःकरण** जाणावे. वृत्ती म्हणजे पाण्यावर जशा लाटा उद्भवतात तसे मनावर उठणारे तरंग. योगसूत्रात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, व स्मृती अशा पाच वृत्तींचे वर्णन आहे. त्याशिवाय सुख, दुःख, इच्छा, द्वेष इत्यादि वृत्तीही आहेत. अंतःकरण जेव्हा जाग्रत, स्वप्न या अवस्थात संकल्प आणि विकल्प वृत्तींनी व्यापले जाते तेव्हा त्याला **मन** ही संज्ञा प्राप्त होते. संकल्प म्हणजे एखादी गोष्ट चांगली वाटणे. ह्याच्यापासूनच काम म्हणजे इच्छा उद्भवते. विकल्प म्हणजे आधीच्या कल्पनेपेक्षा वेगळी कल्पना. तेच अंतःकरण एखाद्या गोष्टीचा निश्चय करते तेव्हा त्याला **बुद्धी** असे म्हणतात. उदाहरणार्थ 'गूळ गोड आहे', हा संकल्प आहे. तो आपल्याला अनिष्ट आहे हा विकल्प. हे मनाचे धर्म आहेत. विचारांती तो खाऊ नये असा निश्चय हा बुद्धीने केला जातो.५.

**अनुसन्धानकं चित्तमहङ्कारस्त्वहङ्कृतिः । व्यानाधार्याद्यं श्रुतेस्तु शब्दभुग्वक्ति वाक्सखम् ।।६।।**
**समानाधारि त्वचान्यत् स्पर्शयाशियादातृ दातृ च । उदानाधारा धीर्नेत्राद् रूपभुक्सगमागमा ।।७।।**
**जिह्वया प्राणवच्चित्तं रसभुग्रतिमूत्रकृत् । सापानाहङ्कृतिर्घ्राणाद् गन्धभुग्विड्विसर्गकृत् ।।८।।**

अनुसंधानकं चित्तम्। यत्+अहंकृतिः तत्+अहंकारः (उच्यते)। आद्यं तु व्यान+आधारि श्रुतेः शब्द+भुक् वाक्+सखं वक्ति।६।
अन्यत् समान+आधारि त्वचा स्पर्श+आशि आदातृ दातृ च उदान+आधारा धीः नेत्रात् रूप+भुक् स+गम+आगमा (भवति)।७।
प्राणवत्+चित्तं जिह्वया रस+भुक् रति+मूत्र+कृत् (भवति) स+अपान+अहंकृतिः घ्राणात् गंध+भुक् विड्+विसर्ग+कृत (भवति)।८।

अनु म्हणजे नंतर संधान ठेवणारे. अर्थात अनुभवानंतर त्याचे स्मरण करणाऱ्या अंतःकरणाला **चित्त** असे म्हणतात. तेच अंतःकरण जेव्हा 'मी' या वृत्तीने स्फुरते तेव्हा त्याला **अहंकार** म्हणतात. एकच अंतःकरण त्याच्या वृत्तींवरून पाच प्रकारे ओळखले जाते. म्हणून या पाचांना अंतःकरणपंचक असेही म्हटले जाते. हे पाच पृथ्व्यादि भूतांच्या सत्त्वगुणापासून झालेले आहेत. त्याच भूतांच्या सत्त्वगुणापासून ज्ञानेंद्रिये, रजोगुणापासून प्राण आणि कर्मेंद्रिये ही जड असूनही तू जो चेतन त्याच्या सान्निध्याने चेतनाप्रमाणेच भासतात आणि व्यवहारही करतात.

पहिले जे **अंतःकरण** ते **व्यान** वायूच्या आश्रयाने श्रोत्रेंद्रियांद्वारा (कानांनी) विविध वर्ण आणि विविध स्वर यांनी युक्त अशा **शब्द** या विषयाचा उपभोग घेते आणि **वाक्**इंद्रियाच्या द्वारां (वाचेने) शब्दांची उत्पत्तीही करते.६.

दुसरे जे **मन** ते **समान** वायूच्या आश्रयाने **त्वचा** (कातडी) **स्पर्श** या विषयाचा भोग घेते, आणि हातांच्या (**हस्त**) माध्यामातून देणे-घेणे या क्रिया करते.

तिसरी **बुद्धी** ही **उदान** वायूच्या आधारे **नेत्र** इंद्रियांनी (डोळ्यांनी) रूप हा विषय भोगते आणि **पाद** म्हणजे पायांनी जाण्यायेण्याच्या क्रिया करते.७.

**कर्मज्ञानेन्द्रियैः पुण्य-पापयोः सुखदुःखयोः। भौतिके पञ्चके कर्तृ-भोक्तृत्वे द्वन्द्वतापि च ।।९।।**
**तल्लिङ्गदेहतादात्म्यात् कर्तृत्वादि वृथार्जितम् । हेतुदेहपरस्वात्म-ज्ञानान्मुक्तिर्ध्रुवाऽचिरात् ।।१०।।**

भौतिके पंचके कर्म+ज्ञान+इंद्रियैः पुण्य+पापयोः सुख+दुःखयोः कर्तृ(त्व)+भोकृत्वे (भवतः) च द्वंद्वतापि (भवति)।९। तत् लिंग+देह+तादात्म्यात् (त्वया) कर्तृत्वादि वृथा अर्जितम्। हेतु+देह+पर+स्व+आत्म+ज्ञानात् अचिरात् मुक्तिः ध्रुवा (अस्ति)।१०।

चौथे **चित्त प्राण** वायूशी जुडून **जिह्वा** (रसना) या इंद्रियांने **रस** या विषयाचा आस्वाद घेते आणि **उपस्थ** (लिंग) या कमेंद्रियाने **रति** (मैथुन) आणि **मूत्रोत्सर्ग** या क्रिया करते.

शेवटचा **अहंकार अपान** वायूशी मिळून **घ्राण** (नाक) इंद्रियाने **गंध** (वास) या विषयाचा भोग करते आणि **गुद** इंद्रियांने **मलविसर्ग** करते. ८.

अशा रीतीने पंचधा अंतःकरण आणि पाच प्राण यांच्याद्वारा कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये पुण्य आणि पाप करतात; तेच पाच त्यांची फळे - सुख आणि दुःख, भोगतात; कर्मेंद्रियांकडे कर्तृत्व आणि ज्ञानेंद्रियांकडे भोक्तृत्व आहे. भूक-तहान, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वेही त्याच सूक्ष्मभूतांपासून झालेल्या पंचकाची - म्हणजेच लिंगदेहाची (सूक्ष्मदेहाची) आहेत. अन्नमय स्थूलदेहाशी त्यांचा संबंध नाही. कारण जेव्हां हा लिंगदेह मृत्यूच्या वेळी स्थूल देहापासून वेगळा होतो तेव्हा त्या अचेतन देहात कर्तृत्व-भोक्तृत्वादि राहत नाहीत.९. शीतोष्णादि द्वंद्वे तसेच कर्तृत्व-भोक्तृत्व हे जर लिंगदेहांशीं निगडित आहेत तर मग त्यांच्याशी तुझा कांहीच संबंध नाही हे स्पष्टच आहे. लिंगदेहाशी तादात्म्य झाल्याने, आपण लिंगदेह आहो या अध्यासाने तू उगीचच हे कर्तत्व-भोक्तृत्व स्वतःवर लादलेले आहे. 'तर मग ते कसे नष्ट करता येईल?' असे विचारशील तर ऐक. लिंगदेहाला तुझ्याशी जोडणारा जे कारणदेह (**हेतुदेह**) आहे त्याच्या पलीकडचे जे तुझे आत्मस्वरूप आहे त्याचे ज्ञान होताच तत्क्षणी तुझ्या कर्तृत्व-भोक्तृत्वांचा लोप होऊन तू कायमचा मुक्त होशील.१०.

**स्वदिदृक्षवरराज्ञान-हेतुसाक्षी परो भवान् । निराकारस्वात्मबुद्धि-महाकारणसाक्ष्यपि ।।११।।**
**स्थाणुरन्तर्बहिर्भास्वानात्मारामो निराकृतिः । चतुर्देहपरः साक्षी प्रत्यगीशोऽसि विद्ध्यदः ।।१२।।**

भवान् स्व+दिदृक्षुः+अरर+अज्ञान+हेतु+साक्षी परः असि। निराकार+स्व+आत्म-बुद्धि+महाकारण+साक्षी+अपि (असि)।११। स्थाणुः अन्तः+बहिः+भास्वान् प्रत्यक्+ईशः असि। अदः (मयोक्तं) विद्धि (येन) निः+आकृतिः निः+अभिमानः चतुः+देह+पर आत्म+आरामः च भविष्यसि।१२।

**कारणदेह -** आपल्या स्वरूपाला पाहू इच्छिणाऱ्याला दारासारखे अडवणारे अज्ञान आहे. हेच वर सांगितलेल्या स्थूल आणि लिंगदेहाचे बीज आहे. तेच सर्व ज्ञानाचा उपसंहार करून बुद्धीला आपल्या बीजात किंवा कारणात विलीन करते. हे रोजच झोपेच्या अवस्थेत आपण अनुभवतो. हाच कारणदेह. 'मग हाच आत्मा का म्हणू नये?' तर हा कारणदेह तमोगुणाने व्यापलेला आहे. झोपेतून उठल्यावर 'मी गाढ झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही' असे म्हणणारा तू त्या अज्ञानाला जाणणारा आहेस. तू त्याच्या पलीकडचा, स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा आणि त्यांचे अभिमानी, विश्व, तैजस् आणि प्राज्ञ यांचा साक्षी आहेस. साक्षात् पहाणारा म्हणजे **साक्षी**. असा तू आहेस. 'मी निराकार आत्मस्वरूप आहे' ही जाणीव म्हणजेच **महाकारणदेह**. इथेही सूक्ष्मरूपाने 'मी' ही जाणीव उरलेली असते. त्याच्याही पलीकडे तू आहेस. 'मग मी काय अभावरूपी (जड) आहे?' असे विचारशील तर तसे नाही. कारण त्या अंतिम वृत्तीचाही तू साक्षी आहेस. स्वयंप्रकाश आहेस.११.

**अन्नासुहृद्ध्यहङ्कार-मयतादात्म्यतो भ्रमः । स्थूलः पञ्चीकृतैर्भूतैः सूक्ष्मः कर्मेन्द्रियासुभिः ।।१३।।**
**धीन्द्रियैर्हेतुर्महांश्च तद्विदात्मन्यथोद्धृते । अन्वयव्यतिरेकाभ्यां परं ब्रह्मैव शिष्यते ।।१४।।**

अन्न+अस+हृद्+धी+अहंकार+मय+तादात्म्यतो भ्रमः (भवति)। पंचीकृतैः भूतैः स्थूलः, कर्म+इन्द्रिय+असुभिः सूक्ष्मः, धी+इन्द्रियैः हेतुः, महान् च (अस्ति) अथ तद्विदा अन्वय+व्यतिरेकाभ्यां आत्मनि उद्धृते परं ब्रह्म+एव शिष्यते।१३-१४।

एखाद्या स्तंभासारखा तू निष्क्रिय, निर्विकार आहेस. यालाच कूटस्थ (कूट = ऐरण) असेही म्हणतात. सोनाराच्या ऐरणीसारखा स्थिर, निष्क्रिय राहून त्यावर घडणाऱ्या अलंकाराशी कसलाही संबंध नसणारा. मात्र कूट जसा परिच्छिन्न - देश, काल, वस्तू आदींनी संकुचित असतो तसा तू नाहीस. तू आत आणि बाहेर प्रकाशमान आहेस. ज्ञानस्वरूप आहेस. हे तुझे मी केलेले वर्णन समजून घे, म्हणजे तू निराकार, निरभिमान, चारी देहांच्या पलीकडील आत्माराम होशील.१२.

**पंचकोश -** तुला असे वाटेल की मी सांगत असलेले जाणणे तुझ्या अनादिकालापासूनच्या भ्रमाने प्रभावित बुद्धीला कसे शक्य होईल? तर ऐक, स्फटिकाजवळ जर जास्वंदीचे फूल ठेवले तर तो स्फटिक लाल रंगाने रंगलेला दिसतो. तसेच कांहीसे तुझे या पंचकोशात्मक देहाच्या तादात्म्याने झालेले आहे. जास्वंदीचे ते फूल स्फटिकापासून बाजूला केले की त्याचे शुद्ध शुभ्र धवल स्वरूप स्पष्ट होते तसेच या पाच कोशांपासून धैर्याने आणि विवेकाने कठोपनिषदांतल्या वचनाप्रमाणे मुंज तृणांतून काडी काढावी तसे आत्मस्वरूप पृथक् केल्याने ('*अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा..*' २:६:१७) तुला ते जाणता येईल. यासाठी तुला आता पाच कोशांचा परिचय करून देतो. **अन्न**मय, प्राणमय (**असु**), मनोमय (**हृत्**), विज्ञानमय (**धी** = बुद्धी) आणि आनंदमय (**अहंकार**) हे ते पाच कोश आहेत. यांच्याशी तादात्म्य पावल्यानेच आपण आपल्याला जन्मादि विकारशील, तहान-भूक वगैरे द्वंद्वांनी प्रभावित, संकल्प-विकल्प करणारा, विज्ञानवान् कर्ता आणि आनंदवान् भोक्ता समजतो.

**भानं स्वप्नेऽस्योर्वभानेऽन्वयः प्राग्विस्मृतिः परः । लिङ्गाभानेऽन्वयः स्वाप-भानं प्राग्विस्मृतिः परः ।।१५।।**

स्वप्ने उरु+अभाने अस्य भानं अन्वयः, प्राक् विस्मृतिः परः(व्यतिरेकः)। लिङ्ग+अभाने स्वाप+भानं अन्वयः प्राक् विस्मृतिः परः।१५।

आता हे पाच कोश थोड्या विस्ताराने पाहू. पंचीकृत भूतांपासून झालेला हा स्थूलदेहच **अन्नमय कोश** आहे.१३.

रजोगुणापासून झालेल्या कर्मेंद्रिये आणि पांच प्राण यांचा मिळून सूक्ष्मदेहांतर्गत **प्राणमय** कोश होतो. सत्त्वगुणात्मक ज्ञानेंद्रिये आणि मन यांचा **मनोमय** कोश तसेच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धी यांचा **विज्ञानमय** कोश होतो. इथे श्लोकात मनोमयाचा अंतर्भाव विज्ञानमयात केला आहे. पाचवा **महान्** नावाचा **आनंदमय** कोश आहे. ह्या कोशांना जाणून, अन्वय आणि व्यतिरेक यांनी त्यांच्यापासून आत्मा बुद्धीने निवडून काढला की परब्रह्मच उरते.१४.

अन्वय म्हणजे अनुवृत्ती आणि व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ती. म्हणजे स्वप्नात असताना स्थूल देहाचे भान नसते. तरी हा अपरोक्ष आत्मा स्वप्न पहाणारा साक्षी असतोच. अर्थात् स्वप्नावस्थेत आत्म्याचा अन्वय (अनुवृत्ती) आहे. त्या वेळी आधीच्या स्थूलदेहाची विस्मृती होते. म्हणजेच स्वप्नावस्थेत स्थूलदेहाची व्यतिरेक (व्यावृत्ती) आहे. त्याचप्रमाणे जागेपणी सूक्ष्मदेहाची विस्मृती किंवा व्यतिरेक असतो. पण साक्षी आत्मा इथेही असतोच. म्हणजे त्याचा अन्वय आहेत. गाढ झोपेच्या अवस्थेत स्थूल देह आणि लिंगदेह या दोहींचे पूर्ण विस्मरण होते. अर्थात् त्यांचा व्यतिरेक आहे. त्या वेळी कसलेच ज्ञान नसले तरी झोपेतून उठल्यावर 'मी सुखाने झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही,' असे त्याला आठवते. याचा अर्थ त्या अज्ञान आणि आनंदमय अवस्थेचा अनुभव घेणारा तिथे होताच. त्याशिवाय त्याला ते कसे आठवले असते? म्हणजे या अवस्थेतही आत्मा साक्षित्वाने आहे.१५.

**तद्विदोऽसुमनोध्याख्या गुणावस्थाभिदः पृथक् । सुप्त्यभानेऽन्वयो भानं समाधौ प्राग्वदन्यकः ।।१६।।**
**त्यक्तत्रिदेहसङ्गस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् । स्थितिः परात्परं वस्तु सच्चिच्छर्म निराकृति ।।१७।।**

समाधौ सुप्ति+अभाने (अस्य) भानं अन्वयः अन्यकः प्राग्वत्। गुण+अवस्थाभिदः असु-मनो-धी+ आख्या तद्विदः पृथक् (कृताः)।१६।
त्यक्त+त्रि+देह+संगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् स्थितिः (तदेव) परात्परं निराकृति सत्+चित्+शर्म वस्तु (अस्ति)।१७।

पंचकोशांचे निरूपण चाललेले असता देहाचा अन्वय-व्यतिरेक यांचा विचार असंगत वाटण्याचे कारण नाही. स्थूलदेह हाच अन्नमय कोश आहे; सूक्ष्मदेहात प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय कोश अंतर्भूत आहेत. कारणदेहच प्रिय-मोद-प्रमोद या वृत्तींसहित आनंदमय कोश आहे. प्रिय म्हणजे इष्ट वस्तूचे दर्शन, मोद म्हणजे त्याचा लाभ आणि प्रमोद त्याची अनुभूती अशा ह्या आनंदमय कोशातील वृत्ती आहेत. इथे एकाच लिंग(सूक्ष्म)देहात तीन कोश (प्राण, मन आणि विज्ञान) गुण आणि अवस्था यांच्या भेदाने होतात. राजस कर्मेंद्रिये आणि प्राण यांच्यापासून प्राणमय कोश; ज्ञानेंद्रिये, मन आणि बुद्धी हे तीनही सत्त्वगुणात्मकच असले तरी बाह्य आणि अंतर अवस्थांमुळे दोन कोश होतात. बहिर्मुख इंद्रिये आणि मन यांचा मनोमय कोश आणि अंतर्मुख इंद्रिये आणि बुद्धी यांचा विज्ञानमय कोश. समाधीच्या अवस्थेत सुषुप्तीचेही भान नसते. जागृती आणि स्वप्न या अवस्थांची स्थूल आणि सूक्ष्म देहांसह जाणीव हरपलेली असते. पण समाधीच्या साक्षित्वाने आत्म्याचा अन्वय मात्र इतर अवस्थांसारखाच तिथेही असतोच.१६. अशा रीतीने अन्वय आणि व्यतिरेकाच्या माध्यमांतून पंचकोशांचा विवेक केल्याने स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा अभिमान, संग किंवा लाग टाकून जी कल्पनारहित सुषुप्तीसारखी (सुषुप्ती नव्हे) स्थिती हेच श्रेष्ठतम, निराकार, सच्चिदानंद परब्रह्म आहे. 'हा आत्माच ब्रह्म आहे' हे श्रुतिवचन (मांडूक्य उ. २) यालाच अनुलक्षून आहे.१७. बीजात लीन झालेला वृक्ष जसा भूमी, पाणी आणि ऋतू यांमुळे अंकुरतो व दृश्यमान होतो, त्याचप्रमाणे सुषुप्ती अवस्थेतील अज्ञानात लीन झालेले जगत् आणि देह अज्ञानी जीवाला जागृत अवस्थेत पुनश्च प्रकटून अनुभवाला येतात.

**क्ष्माप्कालैर्बीजलीनद्रुर् यथेक्ष्यो जागृतेस्तथा । सुप्त्यवित्स्थजगद्देहौ तत्परत्वाविदः पुनः ।।१८।।**
**देहान्ते ज्ञस्याहंतास्थ-विश्वाकारोऽनुजन्मदः । अवस्था जागृतिः स्वप्नो निद्रा तुर्या च तुष्टये ।।१९।।**

बीज+लीन+द्रुः क्ष्म+अप्+कालैः यथा ईक्ष्यो (भवति) तथा सुप्ति+अवित्+स्थ+जगत्+देहौ तत्परत्व+अविदः जागृतेः पुनः (ईक्ष्यौ भवतः)।१८। अज्ञस्य देहान्ते अहंता+स्थ+विश्व+आकारः अनुजन्मदः (भवति)। जागृति, स्वप्न, निद्रा, तुर्या च तुष्ट्य अवस्था (ज्ञेयाः)।१९।

सुषुप्ती अवस्थेतील अज्ञान हाच कारणदेह आहे आणि जागृत अवस्थेतील देह आणि जग यांचे तेच बीज आहे असा भावार्थ.१८. जगाचा पसारा स्थूलदेहासहित अज्ञानरूपी बीजात - कारणदेहात लीन होणे आणि झोपेची स्थिती संपल्यावर तो पुनश्च प्रकटणे या दैनंदिन क्रिया आहेत. देहांताच्या वेळी केवळ स्थूल देहाचा नाश होतो. मात्र त्याचा **विश्व** नावाचा अभिमानी तसाच राहतो. त्यात हा विश्वाकार किंवा जगादाकार असतो. झाडाची फांदी तोडल्यावर जसे तिथेच पुन्हा नवी फांदी फुटावी तसा या विश्वाकारापासून नवा जन्म येतो. हा अहंकार केवळ ज्ञानानेच जात असल्याने ज्ञानाभ्यास हा एकच मोक्षाचा उपाय आहे. त्यानेच या चारही देहांचा प्रविलाप म्हणजे पूर्ण लय होतो. त्यासाठी या देहचतुष्टयाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. ते पुढील तालिकेत दिले आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण या देहांचे क्रमशः विषय, स्वप्न, निद्रा आणि समाधिज हे आनंद आहेत.१९. नेत्र, कंठ, हृदय आणि मस्तक ही स्थाने आहेत. विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यक् हे अभिमानी आहेत. स्थूल, सूक्ष्म (प्रविविक्त), मुद आणि उन्मुद (परानंद) हे भोग आहेत.२०. रज, सत्त्व, तम आणि शुद्धसत्त्व हे गुण आहेत. वैखरी, मध्यमा, पश्यन्ती आणि परा या वाचा आहेत.२१. तीन अवस्थात त्याच क्रमाने ॐकाराच्या तीन मात्रा (अ, उ, म) आहेत आणि तुर्यावस्थेत (महाकारण देहात) अर्धमात्रा आहे.

**विश्वतेजःप्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिताः । दृक्कण्ठहृन्मूर्धसंस्थाः स्थूलसूक्ष्ममुदुन्मुदः ।।२०।।**
**भोगा रजःसत्त्वतमः-शुद्धसत्त्वगुणाः क्रमा । वाचोऽत्र वैखरी मध्या पश्यन्ती च परास्त्रिषु ।।२१।।**
**त्रिमात्रा ॐकृतेस्त्वर्धा तुर्ये ज्ञात्वैवमादितः ।**

दृक्+कंठ+हृत्+मूर्ध+संस्थाः विश्व+तेजः+प्राज्ञ+प्रत्यक्+अभिमानिनः ईरिताः। स्थूल+सूक्ष्म+मुद्+उन्मुदः (क्रमेण एषां) ईरिताः।२०। रजः+सत्त्व+तमः शुद्धसत्त्वगुणाः क्रमात् गुणा (ज्ञेयाः) अत्र क्रमात् वैखरी+मध्या+पश्यंती परा च वाचो (ज्ञेयाः)।२१। त्रिषु त्रिमात्रा ॐकृतेः+तु+अर्धा तुर्ये।

**चार देह, त्यांच्या अवस्था, अभिमानी, स्थान इत्यादींची तालिका**

| देह | अवस्था | अभिमानी | स्थान | आनंद | भोग | गुण | वाचा | देव | लोक | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थूल | जागृत | विश्व | नेत्र | विषयानंद | स्थूल | रज | वैखरी | ब्रह्मा | भूः | अः |
| सूक्ष्म | स्वप्न | तैजस | कंठ | स्वप्नानंद | प्रविविक्त | सत्त्व | मध्यमा | विष्णु | भुवः | उः |
| कारण | निद्रा | प्राज्ञ | हृदय | निद्रानंद | आनंद | तम | पश्यंती | रुद्र | स्वः | मः |
| महाकारण | तुर्या | प्रत्यक् | मूर्धा | समाध्यानंद | परानंद | शुद्धसत्त्व | परा | आत्मा | महः | अर्धमात्रा |

हे सर्व सविस्तर जाणून घेऊन प्रथम स्थूल देहाचा सूक्ष्म देहात लय करावा. त्या सूक्ष्म देहाचा लय कारणदेहात करावा. त्याचा लय महाकारण देहात केल्यावरच आनंदरूप होऊन स्वरूपात स्थिरावतो. दुसरा कांहीच उपाय नाही. **लय** म्हणजे त्या त्या देहाची आत्यंतिक विस्मृती. सामान्य माणूसही एखाद्या क्रियेत गढून गेला की त्याला देहाची विस्मृती होते; कधी कधी तहान-भूकही हरपतात. संगीताच्या प्रभावाने शरीराचे व मनाचेही दुःख माणूस विसरतो. हेच ज्ञानाभ्यासाच्या वा योगाभ्यासाच्या प्रक्रियेने साधता आले पाहिजे.२२.

**स्थूलः सूक्ष्मे कारणे तत् तन्महाकारणे क्रमात् । प्रविलाप्यानन्दमयः स्वस्थो भवति नान्यथा ।।२२।।**
**तस्माद्देहत्रये लीने धीलयः स समाधिकः । तत्ते परात्परं रूपं निर्विकल्पमवेहि सत् ।।२३।।**
**घटादिवद्द्योर्जीवस्याविद्योपाधिस्तु तत्क्षये । खस्थद्योवत्परात्मत्वं जीवत्वं लीयतेऽचिरात् ।।२४।।**
**ज्ञाते क्षराक्षराहंता-परे तत्त्वे स तन्मयः । सृष्टेः प्राङ्निर्विकल्पैका चिद्ब्रह्मास्मीत्यभूत्त्विह ।।२५।।**

एवं आदितः ज्ञात्वा स्थूलः सूक्ष्मे तत् कारणे तत् महाकारणे क्रमात् प्रविलाप्य आनंदमयः स्वस्थो भवति अन्यथा न।२२। तस्मात् देह+त्रये लीने धी+लयः सः समाधिकः। तत् ते परात् परं सत् निर्विकल्पं रूपं अवेहि।२३। द्योः घट+आदि+वत् जीवस्य तु अविद्या उपाधिः तत्+क्षये ख+स्थ+द्यो+वत् परात्मत्वं (भवति)। जीवत्वं अचिरात् लीयते।२४। क्षर+अक्षर+अहंता+परे तत्त्वे ज्ञाते स तन्मयः (भवति)। सृष्टेः प्राक् एका निर्विकल्पा चित् (आसीत्) इह तु ब्रह्म+अस्मि+इति स्फूर्तिः अभूत्।२५।

अशा रीतीने तीनही देहांचा लय केल्याने प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्त्याकार बुद्धीचाही लय होतो. तीच समाधी होय. तेच तुझे परात्पर, निर्विकल्प सत् रूप आहे हे जाण.२३. आकाशाच्या जशा घट आदि उपाधी आहेत तशीच जीवाची अविद्या ही उपाधी आहे. घटाचा नाश होताच त्याने सीमित झालेले आकाश जसे महाकाशच होऊन जाते तसेच अविद्येची उपाधी नष्ट झाली की जीवदशा संपते आणि मूळचा परमात्मभाव प्राप्त होतो.२४. क्षर म्हणजे सर्व भूतमात्र, अक्षर म्हणजे कूटस्थ (आत्मा) आणि अहंता म्हणजे त्रिदेहरूपी संघाचा अभिमान. या तीन्हींच्या पलीकडले तत्त्व जाणणारा..

**स्फूर्तिः खे वायुवत्साद्या मायाद्यस्तज्ज्ञ ईश्वरः । तत्र विश्वोद्गमेहाभूत्साऽन्या मायाथ तत्र तु ।।२६।।**
**जगत्स्यामिति सङ्कल्पोऽभून्महत्तत्त्वनामकः । विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेशजीवकौ ।२७।।**
**जीवोऽविद्याऽऽवृतः स्वाज्ञो महतोऽहंकृतिस्त्रिधा । क्रियाज्ञानद्रव्यशक्ति-रजःसत्त्वतमोगुणैः ।।२८।।**
**प्राणेन्द्रियान्तःकरण-भूतान्यासन्क्रमात्ततः । ततो लोका विराट् तैश्चिदंशात् कार्यक्षमोऽभवत् ।।२९।।**
**लोकाङ्गस्य रदास्तारा माया हास्यं निशादिने । निमेषोन्मेषौ कटाक्षः सृष्टिः कुक्षिरपांपतिः ।।३०।।**

खे वायुवत् स्फूर्तिः सा आद्या माया तज्ज्ञ ईश्वरः। तत्र विश्व+उद्गम+इहा अभूत् सा अन्या माया अथ तु तत्र जगत्+स्याम्+इति संकल्पो महत्+तत्त्व+नामकः अभूत्। विद्या+अविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेश जीवकौ (ज्ञाते)।२६-२७। अविद्या+आवृतः स्व+अज्ञः जीवः महतः+अहंकृतिः त्रिधा। रजः+सत्त्व+तमो+गुणैः क्रिया+ज्ञान+द्रव्य+शक्तिः (अभूत्)।२८। ततः क्रमात् प्राण+इन्द्रिय+अन्तः करण-भूतानि आसन्। ततः लोकाः (आसन्) विराट् चित्+अंशात् तैः कार्यक्षमः+अभवत्।२९। लोक+अंगस्य तारा रदाः माया हास्यं निशा+दिने निमेष+उन्मेषौ कटाक्षः सृष्टिः अपां पतिः कुक्षिः।३०।

..त्या तत्त्वाशी एकरूप होतो. ते स्पष्ट करण्यासाठी उपक्रम आणि उपसंहार यांचे वर्णन केले आहे.

**उपक्रम -** सृष्टीच्या पूर्वी कल्पनारहित, एकच एक असे चैतन्य होते. शांत निश्चल आकाशात एखादी वायूची लहर उठावी तशा त्या ब्रह्मात 'मी ब्रह्म आहे' अशी वृत्ती निर्माण झाली.२५.

ही जी हवेच्या लहरीसारखी स्फूर्ती झाली तिलाच **आदिमाया** म्हणतात. तिचा ज्ञाता ईश्वर आहे. ह्या सर्वज्ञ, सर्वकर्तृत्ववान् ईश्वराला विश्वाची निर्मिती करावी अशी इच्छा झाली. ही दुसरी माया होय. ही मलिनसत्त्वोपाधिक **अविद्या माया**. तिच्या ठायी 'जगत् व्हावे' असा जो संकल्प झाला त्यालाच **महत् तत्त्व** असे नाव आहे. विद्या माया आणि तिचा ज्ञाता - तिच्यांत प्रतिबिंबित झालेले चैतन्य, हा **सर्वेश्वर**. दुसरी मलिनसत्त्वोपाधिक अविद्या माया आणि

**नाड्यो नद्यो द्रुमाः केशा वृष्टी रेतोऽस्थि पर्वतः । विराजः स्थूलदेहोऽयं चराचरजगन्मयः ।।३१।।**
**दिग्वाय्वर्कप्रचेतोऽश्वि-वह्नीन्द्रोपेन्द्रमृत्युकाः । ज्ञानकर्मेन्द्रियाण्यन्तःकरणानि हरिः शशी ।।३२।।**

नद्यो नाड्यः, द्रुमाः केशाः, वृष्टिः रेतः, पर्वतः अस्थि, (एवं) चराचर+जगत्+मयः अयं विराजः स्थूलदेहः (ज्ञेयः)।३१। दिक्+वायु+अर्क+प्रचेतः+अश्वि+वह्नि+इन्द्र+उपेन्द्र+मृत्यकाः ज्ञान+कर्म+इन्द्रियाणि (बोध्यानि)। हरिः शशी ब्रह्म+नारायण+ईशाः च अन्तःकरणानि। (एवमयं) विराजः सूक्ष्मदेहः।३२।

तिच्यांत प्रतिबिंबित होणारा तिचा ज्ञाता जीव. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, स्वतंत्र, विभू आहे तर जीव अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, परतंत्र आणि परिच्छिन्न आहे.२६-२७. अविद्येने आवृत (झाकलेला) हा जीव स्वतःला जाणत नाही. आदि जीव म्हणजेच ब्रह्मा किंवा हिरण्यगर्भ होय. हा समष्टीचा सूक्ष्म देह आहे. महत्तत्त्वापासून त्रिविध अहंकार झाले. रजोगुणात्मक क्रियाशक्ती, सत्त्वगुणात्मक ज्ञानशक्ती आणि तमोगुणात्मक वस्तुशक्ती असे ते तीन अहंकार होत.२८. राजस अहंकारापासून कर्मेंद्रिये आणि प्राण झाले. सात्त्विक अहंकारापासून पाच ज्ञानेंद्रिये, अंतःकरणपंचक आणि त्यांच्या देवता झाल्या. तामस अहंकारापासून पृथिवी, आप इत्यादि पंच महाभूते झाली. त्या भूतांपासून चतुर्दश भुवने (लोक) झाले. ते असे भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक (स्वर्ग), महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे वरचे सात लोक आणि अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हे सप्तपाताल लोक झाले. त्या लोकांपासून विराट् पुरुष प्रकट झाला. त्या विराटांत चैतन्याचा अंश (चिदंश) प्रवेशल्याने तो कार्यक्षम झाला. हा विराट् समष्टी स्थूलदेह आहे.२९.

**विराट् -** हे चौदा लोकच ज्याचे अवयव आहेत अशा त्या विराटाचे नक्षत्र हे दात आहेत, माया हास्य आहे, रात्र आणि दिवस निमेषोन्मेष आहेत, त्याच्या कटाक्षाने सृष्टी होते, सागर हा त्याची कूस आहे.३०.

**ब्रह्मनारायणेशाश्च सूक्ष्मदेहोऽथ कारणम् । अविद्याऽद्या महत्प्रत्यगीशो देहनिरासतः ।**
**तत्पदं व्यतिरेकात्त्वं-पदं तत्त्वमसि ह्यतः ।।३३।।**
**भूरप्स्वग्नौ ताः स वायौ स खे तत्प्रविलापयेत् । द्रव्ये तमसि तत्सत्त्वे रजः सत्त्वं तमस्यथ ।।३४।।**
**अहंकृतौ तन्महति साविद्यायां लयो द्वयोः । साद्यायां सा ब्रह्मणीत्थं त्वंपदं व्यतिरेकतः ।।३५।।**

अथ अविद्या कारणं, आद्या महत्कारणं, ईशः (एव) प्रत्यक्, व्यतिरेकात् देह+निरासतः त्वपदं (इव) तत्पदं, अतः हि तत् त्वम् असि।३३। भूः अप्सु, ताः अग्नौ, स वायौ, स खे, प्रविलापयेत्। तत् द्रव्ये तमसि, तत् (तमः) रजः सत्त्वे, सत्त्वं तमसि, तत् (तमः) अहंकृतौ, (सा) महति, (स) (महान्) अविद्यायां, द्वयोः (अपि) लयः, सा आद्यायां, सा ब्रह्मणि, इत्थं व्यतिरेकतः त्वं पदं (बोध्यम्)।३४-३५।

नद्या त्या विराटाच्या नाड्या आहेत, वृक्ष त्याचे केस आहेत, वृष्टी रेत आहे, पर्वत अस्थी आहेत. असा हा चराचर जगत्स्वरूप विराट् ह्याला (समष्टीचा) स्थूलदेह जाणावा.३१.

**हिरण्यगर्भ -** दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इन्द्र, उपेन्द्र आणि यम ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. (क्रमशः कान, त्वचा, नेत्र, रसना, नासिका, वाणी, हात, पाय, गुद आहेत. प्रजापती ज्याचे उपस्थ आहे.) समष्टीची इंद्रिये ही व्यष्टीच्या (जीवाच्या) इंद्रियांच्या देवता आहेत. जीवाच्या इंद्रियांची कार्यक्षमता ही समष्टीच्या इंद्रियरूप देवतांच्या अनुग्रहावर अवलंबून आहे. हरी त्याचे अंतःकरण आहे तर चंद्र मन आहे.३२. ब्रह्मदेव त्याची बुद्धी आहे आणि रुद्र अहंकार आहे. हा विराट पुरुषाचा (समष्टीचा) सूक्ष्म देह होय. यालाच हिरण्यगर्भ किंवा सूत्रात्मा असेही म्हणतात. अविद्या हा समष्टीचा कारण देह आहे तर आदिमाया (विद्यामाया) महाकारण देह आहे. ईश्वर हा समष्टीचा प्रत्यगात्मा आहे. वर ज्याप्रमाणे जीवाच्या तीन देहांचा निरास किंवा लय करून त्याचे प्रत्यक् स्वरूप सिद्ध केले, त्याच प्रकारे समष्टीच्या तीन देहांचा (विराट, हिरण्यगर्भ आणि अविद्या माया) लय केला की जीवाचे ईश्वराशी

**व्याख्यारूपैकसद्वस्तु सृष्टेः प्राक् चाधुनापि तत् । त्वं श्रोत्रात्मेन्द्रियातीतमस्यैक्यमनुभूयताम् ।।३६।।**
**सृष्टेः प्राक् सच्चिदानन्द-रूपोऽद्याहङ्कृतेर्लयात् । प्राग्वदूर्ध्वमपीदृक्त्वं या सृष्ट्यस्तित्वकल्पना ।।३७।।**
**गवाधाराहङ्कृतेः प्राक्-स्थानाभावान्न साद्य चेत् । तद्वत्क्वास्ति त्वमेकोऽतोऽद्वितीयो ब्रह्म चिन्मयः ।।३८।।**

व्याख्या+रूप+एकसत्+वस्तु (यत्) सृष्टेः प्राक्+अधुना+अपि तत्। श्रोत्र+आत्म+इन्द्रिय+अतीतं त्वं असि। ऐक्यं अनुभूयताम्।३६। सृष्टेः प्राक् त्वं सच्चिदानन्दरूपः (आसीः)। अद्य अहंकृतेः लयात् प्राक् वत् सच्चिदानंदरूपः (असि)। ऊर्ध्वं अपि ईदृक (भविष्यसि)। अहंकृतेः प्राक् या सष्टि+अस्तित्व+कल्पना सा गो+आधारा अद्य न। चेत् तद्वत् क्व अस्ति? अतः त्वं एकः अद्वितीयः चिन्मयः ब्रह्म (असि)।३७-३८।

ऐक्य सिद्ध होते. 'तो तू आहेस' या महावाक्यातील 'तू' या पदाने (*त्वंपदाने*) लक्षिलेल्या जीवाची, 'तो' या पदाने *(तत्पद)* दर्शविलेल्या ईश्वराशी एकरूपता आहे हा निश्चय होतो.३३.

**उपसंहार -** आता हा निरास कसा करायचा ते सांगत आहेत. पृथ्वीचा लय जलात करायचा; त्या जलाचा लय तेजात (अग्नीत) करायचा; तो अग्नी वायूत विलीन करायचा; आणि वायूचा आकाशात लय करायचा. ते आकाश द्रव्यात्मक तमोगुणात विलीन करायचे. मग तमोगुणाचा (अहंकारातील) रजोगुणात, रजोगुणाचा (अहंकारातील) सत्त्वगुणात आणि सत्त्वगुणाचा (अहंकारातील) तमोगुणात लय करावा.३४. तो तमोगुण अहंकारात लीन करून अहंकाराचा लय अविद्यामायेत करावा. अशा रीतीने विराजाच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांचे प्रविलापन होते. मग अविद्यामायेचा लय आदिमायेत आणि तिचा लय ब्रह्मात करावा. अशा रीतीने सर्व विलापांची सीमा जे ब्रह्म तेच उरते. ते व 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ आहे. याच प्रकारने देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी यांचा विलय करून उरलेला जो प्रत्यगात्मा तोच 'त्वं' पदाने लक्षिलेला आहे.३५.

**ब्रह्मबुद्ध्या द्वयाभावाद् देह्यहंकृतिसंक्षयात् । शिष्यतेऽत्र निराकारः क्वाख्यारूपात्मकं जगत् ।।३९।।**
**स्रग्भोगिवद्दृष्टमपि ज्ञानदीपान्न ते भ्रमः । ज्ञानं त्यक्त्वा दृढाभ्यासी भ्रमेणापि न युज्यते ।।४०।।**

ब्रह्म+बुद्ध्या अहंकृति+संक्षयात् द्वय+अभावात् अत्र देही निराकारः शिष्यते। आख्या+रूपात्मकं जगत् क्व?।३९। स्त्रक्+भोगि+वत् दृष्टं अपि (जगत्) ज्ञान+दीपात् ते भ्रमः न। दृढ+अभ्यासी ज्ञानं त्यक्त्वा अपि भ्रमेण न युज्यते।४०।

**तत्त्वमसि -** या दोहोंचे ऐक्य दाखविण्यासाठी महावाक्याचे आता निरूपण करीत आहे. नाम आणि रूप यांच्या पलीकडील एकमेवाद्वितीय (सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदांनी रहित) जी वस्तू सृष्टीच्या पूर्वीही होती, आज स्थितीच्या काळातही आहे आणि प्रलयानंतरही राहणारच आहे.

छांदोग्यात (*वाचारंभणं विकारो नामधेयम्।* ६:१:४)) सोन्याच्या विविध अलंकारांची नावे जरी वेगळी असली तरी त्यातील सोन्यात कांहीच फरक नसतो, या दृष्टांताने संपूर्ण चराचर जगत हे एकाच ब्रह्माचे विकारभूत आहेत. त्याची नावे जरी वेगवेगळी असली तरी ती बोलण्यासाठी आहेत. ब्रह्मस्वरूपात कांही फरक पडत नाही. तसेच बृहदारण्यक उपनिषदांत (३:४:२) 'याच्याशिवाय इतर सर्व दुःखमूलक- नाशिवंत आहे.' असे म्हटले आहे. ह्या श्रुती याच ब्रह्मवस्तूचा निर्देश करतात. हेच 'तत्'पदाचे लक्ष्य आहे. हे ऐकणारा जो तू आहेस त्याचा देह, इंद्रिये, मन, बुद्धी आदींच्या संघाताच्या पलीकडचा आहेस. त्यांच्या प्रविलापनाने उरलेले जे प्रत्यक्, साक्षी चैतन्य आहे तेच 'त्वं'पदाचे लक्ष्य आहे. या महावाक्यांत या दोन्ही पदांची 'असि' या पदाने समानता प्रतिपादली आहे. याच्या अखंडत्वाने हे दोन्ही - जीव आणि परब्रह्म, 'तेच तू' आणि 'तूच ते' अशी एकरस एकरूपता तुला निदिध्यासनादि क्रमांनी अपरोक्षतया (प्रत्यक्ष) अनुभवायची आहे.३६. सृष्टीच्या पूर्वी तू सच्चिदानंदस्वरूप होतास. आता अहंकाराचा लय झाल्यावर आणि तुझ्या सर्व उपाधी गळून पडल्यावर तू पूर्वीसारखाच सच्चिदानंदरूप आहेस. यानंतरही - विदेह कैवल्यानंतरही असाच सच्चिदानंदरूप राहणार आहेस. अर्थात् तू एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहेस. शिष्याच्या मनांत

**सज्यह्यभावः प्रागूर्ध्वं तद्वद् ब्रह्मणि चास्य तु । अभावाच्छून्यता मैहि तज्ज्ञ सच्चित्सुखात्मक ।।४१।।**
**भास्वान्नित्यः प्रबोधोऽयं वेदा भ्रान्तहितैषिणः । साधकान्यद्य कार्याणि साध्याभावान्न कुर्वतः ।।४२।।**

यथा स्रजि अहि+अभावः तद्वत् प्राक् ऊर्ध्व च ब्रह्मणि अस्य तु (अभावः) तत्+ज्ञ सच्चित्सुखात्मक अभावात् शून्यता मा एहि।४१।
अयं प्रबोधः भास्वान् नित्यः (अस्ति)। वेदाः भ्रान्त+हितैषिणः (सन्ति) अतः साधकानि कार्याणि। अद्य साध्य+अभावात् न कुरु।४२।

अशी शंका आहे की, 'ही माझ्याहून वेगळी अशी सृष्टी मला प्रत्यक्ष दिसते आहे, अनुभवाला येते आहे तर मग मी अद्वितीय कसा असेन?' गुरुमहाराज सांगत आहेत, 'पूर्वी इंद्रियादींच्याविषयी अध्यासाने जो अहंकार होता त्याच्या आधाराने सृष्टीच्या अस्तित्वाची कल्पना होती. पण आता तुला ज्ञान झाले असल्याने तुला सर्व कांही इंद्रियादिक आत्ममयच झाले आहे. त्या सृष्टीच्या अस्तित्वाच्या कल्पनेला आता आधारच राहिला नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) सांगितल्याप्रमाणे सर्व कांही एकरूपच झाले आहे. मग कोण कुणाला पाहील, कोण कुणाला जाणील?'३७. आता पूर्वीसारखी सृष्टी शोधूनही सापडणार नाही. अंधारात भासलेला साप, दिवा आणून पाहिल्यावर, आणि ती दोरी असल्याचे जाणल्यावर, पुन्हा हुडकूनही सांपडणार नाही. तो ना कधी होता, ना आता आहे, ना पुढे कधी असेल.३८. बुद्धीची वृत्ती अखंडतया ब्रह्माकार झाली की निराकार स्वरूपच उरते. तिथे नामरूपात्मक जगत् कुठे असणार?३९. भोगकाळामध्ये कदाचित् कधी माळेवर भासणाऱ्या सापासारखा जगाचा भास जरी तुला झालाच तरी आता ज्ञानदीप तेवत असल्याने तो भ्रम टिकणार नाही. 'मग हा ज्ञानदीप किती काळपर्यंत राखून ठेवायचा' असे विचारशील तर 'अभ्यास दृढ होईपर्यंत' हे त्याचे उत्तर आहे. एकदा अभ्यास दृढ झाला की मग ज्ञान आवर्जून सांभाळावे लागत नाही. पण त्यासाठी स्वप्नातही 'मी ब्रह्म आहे' ही भावना स्थिर राहिली पाहिजे.४०.

**भगवत्वाक्यतोऽसक्तः कुरु वा तैर्न लिप्यसे । मनो विनापि ज्ञातासि ध्यानादेः किं प्रयोजनम् ।।४३।।**

वा भगवत्+वाक्यतः असक्तः (सन्) कुरु तैर्न लिपसे। (त्वं) मनोविना अपि ज्ञाता असि (अतः) ध्यान+आदेः किं प्रयोजनम्।४३।

**ज्ञानी पुरुषाने कर्म करावे का?** जसा माळेत सापाचा अभाव तीनही काळात आहे, तसाच ब्रह्मात भ्रमाच्या पूर्वी आणि ज्ञानाच्या नंतरही आहेच. पण अभावालाच मोक्ष मानून शून्यतेचा अंगीकार करू नकोस. कारण त्या अभावाला जाणणारा सच्चिदानंदस्वरूप असा तू आहेसच.४१. तुला हा जो प्रकाशरूप बोध झाला आहे तो आजच झाला असे नाही. हा नित्यच आहे. कधीही नष्ट न होणारा आहे. 'हा जर नित्यच आहे तर वेद ह्या बोधाच्या प्राप्तीसाठी का उपदेश करतात?' या शिष्याच्या प्रश्नाला उत्तर आहे की, भ्रान्तीने देहालाच आपले स्वरूप मानणाऱ्या कल्याणकामी लोकांसाठी वेदांचा उपदेश आहे. तो मुक्तासांठी नाही. ज्यांना आत्मज्ञान हे साध्य आहे अशा साधकांनी वेदांनी उपदेशिलेली साधने करावीत. आत्मज्ञान झाल्यावर त्याची आवश्यकता राहत नाही. तेव्हा आता तू कांहीही साधन करूं नकोस. भ.गीतेत (३:१८) हेच सांगितले आहे. '*नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।*' त्याला कांही करण्याने वा न करण्याने कांहीच कमवायचे वा गमवायचे नसते.४२. किंवा तिथेच पुढे २५ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे लोकसंग्रह करण्यासाठी, लोकांना धडा घालून देण्यासाठी निरासक्त बुद्धीने कर्मे करावीत. आसक्ती आणि अहंकाराचा तुझ्या ठिकाणी अभाव असल्याने तू त्या कर्मांनी लिप्त होणार नाहीस. 'मग निदिध्यासनादि करावे कां?' या शिष्याच्या प्रश्नाला अपक्षून सांगितले आहे की त्याचीही आवश्यकता नाही. तुला देहाच्या ठिकाणी विपर्यस्त अहंभावना नसल्याने आणि तू मनाशिवायच स्वरूपाला जाणत असल्याने ध्यानादींचे काय प्रयोजन? पंचदशीत (तृप्तिदीप २६१) विपर्यस्ताला ध्यानाची आवश्यकता आहे अविपर्यस्ताला नाही असे प्रतिपादन आहे.४३. '*तस्य तावदेव चिरं*' (छांदोग्य उपनिषद ६:१४:२) या श्रुतीनुसार जोवर प्रारब्ध आहे तोवर हा पंचकोशात्मक देह राहील. मात्र, वर्ण, आश्रम, संबंध इत्यादि देहाचे धर्म, भूक, तहान इत्यादि प्राणाचे धर्म तसेच शोकमोहादि मनाचे धर्म, यांचा आता तुझ्याशी कांहीच संबंध नाही.

**अदेहप्राणहृद्धर्मः प्रारब्धाशीः सुखं वस । इदं रहस्यं बोधाख्यं तज्ज्ञो ब्रह्ममयो भवेत् ।।४४।।**

**इति बोधाख्यं द्वितीयं रहस्यम् ।।**

**समाप्तोऽयं ग्रन्थः प्रीयतामनेन श्रीदत्तः ।।**

**इति श्रीमत्परमहंस परिव्रजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती (टेम्बे) स्वामिविरचितं**

**श्रीगुरुचरितं सम्पूर्णम् ।।**

अ+देह+प्राण+हृत्+धर्मः (सन्) प्रारब्ध+आशीः सुखं वस। इदं बोधाख्यं (अति) रहस्यं तत्+ज्ञः ब्रह्म+मयः भवेत्।४४।

आता तू केवळ साक्षित्वाने प्रारब्धाचा वाहक बनून राहा. (पुढील अर्धश्लोक ग्रन्थालंकार आहे) हे 'बोध' नावाचे रहस्य आहे. रहस्य म्हणजे वेदांचा गोपनीय भाग जो अधिकारी श्रोत्यांच्याच (वाचकांच्या, ग्राहकांच्या) पदरी पडतो. हे रहस्य जाणणारा ब्रह्मरूप होतो. कठोपनिषदाच्या (२:३:८) प्रतिपादनानुसार 'जे जाणल्याने जीव बंधनांतून मुक्त होऊन अमृतत्व पावतात' तेच हे रहस्य होय.४४.

**इति द्वितीयं रहस्यं । संपूर्णोऽयं टीकाग्रंथः । प्रीयतामनेन सर्वान्तर्यामी भगवान्श्रीदत्तसद्‌गुरुः ॥**

**ज्ञानं त्रयोदाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः । पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट् ॥१॥**

**पाचात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताऽखिलानाम् ।**

**श्रीद्वारकायां चरितस्य तस्य श्रीसद्‌गुरोर्वेदनुतस्य तस्य ॥२॥**

**शालिवाहनाके क्ष्माश्विवसुभूमिमिते (१८२१) त्वियं ।**

**टीका संपूर्णतां प्राप्ता चातुर्मास्ये ह्यवर्षके ॥३॥ ॥ संवत् १९५६ ॥**

हा टीकाग्रंथ इथे संपूर्ण झाला. याने सर्वान्तर्यामी भगवान श्रीदत्तसद्गुरू प्रसन्न होवोत. तेरा अध्यायात ज्ञानयोग, नंतरच्या पाच अध्यायात कर्मयोग आणि शेवटच्या पाच अध्यायात भक्तियोग यांचे निरूपण योगिराज दत्तात्रेयांनीच करविले. त्या वेदवंद्य सद्गुरूंच्या चरित्रावरील नऊ अध्यायांवरची टीका पश्चिम समुद्राच्या तीरावर प्रभास क्षेत्री (ग्रंथ जवळ नसतांनाही) संपन्न झाली. शेष सर्व ग्रंथ श्रीक्षेत्र द्वारकेच्या चातुर्मासात शालिवाहन शकाच्या १८२१व्या वर्षी अवर्षणात पूर्ण झाला. संवत् १९५६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील बोधरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

श्रीगुरुः शरणम्।

श्री.प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृतम्

# श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री)

सटीक मराठी अनुवादासहित.

अनुवादक/संपादक

**डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख.**

**पहिली आवृत्ती ---------**

**प्रकाशक :**

१. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा.

२. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती स्वामिमहाराज व श्री. लोकनाथतीर्थ स्वामिमहाराज ट्रस्ट, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

३. श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, नारेश्वर, पोस्ट सायर, व्हाया अंकलेश्वर, जि.वडोदरा ३९३१०७.



**मुद्रक**

के. जोशी आणि कंपनी
सदाशिव पेठ, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी - ०२०-२४४७१४०९
kjoshipress@gmail.com

संपादक.

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख,ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध, पुणे ४११००७.

**प्राप्तिस्थान**

श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

**मूल्य - रु. २००/-**

## ।। श्रीगुरुः शरणम् ।।





मला द्विसाहस्री ग्रंथाची उपासना देणाऱ्या

सद्गुरु प.पू.योगिराज वा.द.गुळवणीमहाराज

आणि  त्या ग्रंथांत प्रवेश करविणाऱ्या  प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर

यांच्या चरणकमलीं समर्पित

**(पू.डॉ.धीरूभाई जोशी, अध्यक्ष, श्रीवासुदेवप्रबोधिनी व प्रमुख विश्वस्त श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, वडोदरा यांचा आशीर्वाद.)**

## अस्मदीयम्।

'द्विसाहस्री गुरुचरितम्' लोके ऱ्हस्वत्वात् शीघ्रफलदत्वाच्च प्रियं तथा विद्वत्सु साहित्यिकगुणत्वादुत्कृष्टटीकोपेतत्वादतीव संमान्यम्। अतः तद्‌ग्रन्थस्य लौकिकभाषायामनेकभाषान्तराणि जातानि।

अयं ग्रन्थोऽपि तद्वन्महाराष्ट्रभाषायां परिवृत्तोऽस्ति। तस्यानुवादकोऽपि डॉ. वा. व्यं. देशमुखो भक्तहृदयः, संस्कृत-प्राकृतभाषानिष्णातोऽस्ति लोके लब्धप्रतिष्ठितः। विशेषतः ब्रह्मलीनो ब्रह्मश्रीकवीश्वरशास्त्रिपदानुरागी तथा च तत्कृपालब्धो वर्तते। अतोऽस्य ग्रन्थस्य महिमा।

प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीमहाराजैरनेकग्रन्थान् रचितान्। 'प्रबोधिनी' तेषां भक्तजनमध्ये प्रसारकार्यं करोति। अद्य स्वामिसमाधीशताब्दिवर्षेऽयं ग्रन्थः प्रकाश्यते। तत्समीचीनं प्रशस्यं च। तदुपरि स्वामिमहाराजचरणानां शुभाशीर्वादाः सन्तु। भक्तजनेषु तत्प्रियतमो भवत्विति मे शुभाशा।

तत्प्रकाशने यैः प्रयत्नशीलैः यद्यत्सकार्यं कृतमस्ति तत्तत्तु सर्वथाऽभिनन्दनीयमस्ति। अस्य द्वितीयावृत्तिः शीघ्रं प्रकाशं पश्यतु।

भवदीयो

**हरिप्रसादः (धीरूभाई) जोशी.**

# प्रस्तावना.

**।। श्रीगुरुः शरणं मम।।**

सद्गुरु भगवान श्रीदत्तात्रेय का आविर्भाव बोध-अवतार रूप होने के प्रतिपादन से ही 'श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)' ग्रंथ का आरंभ होता है। उसी क्रम में श्री श्रीपादश्रीवल्लभ एवं श्री नरसिंह सरस्वती सद्गुरु की बोध-अवतार रूप में लीलाएँ हुई हैं। उसी क्रम में प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजश्री के बोध-अवतारकृत्य स्वरूप लीलाओं का विशद निरूपण पूजनीय श्री रङ्ग अवधूत महाराजश्री विरचित त्रिकाण्डात्मक वरद ग्रन्थ 'श्रीगुरुलीलामृत' के उपासनाकाण्ड एवं उन के अनुपम स्तोत्र 'श्रीवासुदेवनामसुधास्तोत्र' में दृष्टव्य है।

१) **तत्त्वज्ञानमुपादिश्य**... अर्थात् उन्हों ने माता (पूजनीया रमामाई) व पत्नी (पूजनीया अन्नपूर्णा माता) को तत्त्वज्ञान का उपदेश दिया... (श्लोक १९).

२) **भाष्यादि श्रावयामास**....जालवण (गांव) में भाविक भक्तों को भाष्य का श्रवण कराया.(श्लोक २६).

३) **योऽधिकारभिदा ग्रन्थान् रचयित्वा सुबोधकान्। उद्दधार भवे मग्नान् वासुदेव नमोऽस्तु ते।।५०।।** अर्थात् जिन्हों ने भवसागर में मग्न=रममाण लोगों का उद्धार करने के लिए उन के अधिकार भेद के अनुसार (अनेक) सुबोध व सरल=सुबोधात्मक ग्रंथों की रचना की।

पूजनीय स्वामी महाराज विरचित सद्बोधात्मक ग्रन्थों की सूची में श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री) ग्रन्थ अपने रचनास्वरूप वैशिष्ट्य एवं निरूपण रीति वैशिष्ट्य के उपरान्त औपासनिक उपादेयता वैशिष्ट्य से अनुपम वरद ग्रन्थ है।

ग्रन्थ श्रीगुरुतत्त्व-विमर्शात्मक है। गुरुतत्त्व ही मानवी साधना का चरम लक्ष्य व परम प्राप्तव्य है। श्रीगुरुतत्त्व अखण्ड आनन्द एकरस ज्ञानस्वरूप अर्थात् तत्त्वतः निर्विशेष - निर्गुण परब्रह्म स्वरूप होते हुए भी श्रीपादश्रीवल्लभ एवं नरसिंह सरस्वती अपने संन्यासी चरित द्वारा प्रत्यक्ष रूप में अपने भक्त उपासकों को दिव्यमन्त्र व अभीष्टफलप्रदान रूप अनुग्रह करते हैं। अतः श्रीगुरुराज सविशेष-निर्विशेष = सगुण-निर्गुण दोनों रूपों में उपास्य परब्रह्म हैं। मन्त्र ही देवस्वरूप है, इस सिद्धान्त के अनुसार प्रस्तुत ग्रन्थ सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय स्वरूपभूत श्रीश्रीपादश्रीवल्लभ-श्रीनरसिंह सरस्वती सद्गुरु अभिन्न मन्त्रमय ग्रन्थ है। स्वभक्त अभीष्ट प्रदानात्मक है, यथा :- **मुमुक्षुभेषजं मुक्तजीवनं विषयीष्टदम्। श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वात् वच्मि तेऽल्पकम्।।(३:९).** स्वोपज्ञ टीका में भगवान ग्रन्थकार कहते हैं, 'श्रीसद्गुरु का चरित्र (यद्यपि हृदय व वाणी से अत्यन्त दूर - अगम्य है, तथापि मैं तुम्हें थोडा सा कहता हूँ) विषयी जनों को अभीष्ट (अर्थ-काम) प्रदान करने वाला, मुमुक्षु भक्तो को संसार-रोग निवारक औषध और मुक्तों को निरुपम आह्लाद-जीवनभूत, कृतघ्नत्वनिवृत्ति रूप जीवनसाफल्य प्रदान करनेवाला है।'

यद्यपि सकल अभीष्ट अर्थ प्रदान करने वाली अनेक मन्त्र उपासनाएँ विभिन्न तन्त्र ग्रन्थों में प्रसिद्ध हैं, तथापि वे प्रायः शापित होने से, उनका प्रभाव कीलकत्व से प्रतिबद्ध होने के कारण शापविमोचन, उत्कीलन, आवरणपूजा, बलिदान आदि में थोडा सा भी वैगुण्य आने से उपासना का फल प्राप्त नही होता है। प्रस्तुत उपासना ग्रन्थ (और पूरी श्रीदत्तात्रेय उपासना प्रणाली) में कहीं किसी शापजनित प्रतिबद्धता न होने से यह समग्र उपासना अनायास फलदायी होने का प्रतिपादन भगवान ग्रन्थकार ने किया है। अतः अनायास फलप्राप्ति प्रस्तुत ग्रन्थ-उपासना का एक वैशिष्ट्य है।

श्रीगुरुचरितम्(द्विसाहस्री) स्वयं मन्त्रमय उपासना ग्रन्थ है और उस पर लिखी गई स्वोपज्ञ संस्कृत टीका अपने आप में एक स्वतन्त्र ग्रन्थ है, वस्तुतः ये दो ग्रन्थ हैं। दोनों की संस्कृत भाषा अत्यन्त प्राञ्जल है। मराठी भाषा में यह

ग्रन्थराज अनुवाद के रूप में पहले सी ही प्राप्त है। गुजराती व हिन्दी में भी ग्रन्थ का अनुवाद उपलब्ध है। यहाँ प्रस्तुत ग्रन्थ में विद्वान्, अनन्य उपासक व अनुग्रहीत भक्त अनुवादकजी ने प्रत्येक श्लोक का अन्वय, श्लोकार्थ एवं स्वोपज्ञ टीका पर आधारित विशद विवरण दे कर उपासक भक्तों के लिए एक सहायक मार्गदर्शक ग्रन्थ प्रदान किया है।

अनुवादक डॉ.श्री वासुदेव व्यं. देशमुखजी मूलतः चिकित्साशास्त्र की पॅथॉलोजी विद्या शाखा के गणमान्य अभ्यासी व प्राध्यापक, अनुसन्धानकर्ता के रूप में सर्विस प्रदान करने के बाद ऐच्छिक निवृत्त जीवन अध्यात्म मार्ग में व्यतीत कर रहे हैं। अपने कार्यक्षेत्र में सफल सिद्धि प्राप्त करने के साथ आपने प.पू. योगिराज श्रीगुळवणी महाराजश्री से अनुग्रहित हो कर, प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वरजी के सान्निध्य में रह कर जो आध्यात्मिक सिद्धि प्राप्त की है, उसका स्पष्ट प्रतिबिम्ब उनके व्यक्तित्व, कर्तृत्व में दृष्टिगोचर होता है। कम्प्युटर सिद्धिद्वारा उन्हों ने भक्तसमुदाय के लिए जो कार्य किया है वह अपने आप में अप्रतिम है।

सम्प्रति पूजनीय स्वामी महाराजश्री के समाधि शताब्दि वर्ष में प्रस्तुत ग्रन्थ एक सम्मान्य अनुवादक की साधना के फलस्वरूप विशाल जनसमाज को प्राप्त हो रहा है। सम्माननीय डॉ.श्री देशमुखजी एवं सम्माननीय प्रकाशन व्यवस्था का अभिवादन करते हुए मैं आनन्द और धन्यता का अनुभव करता हूँ।

**।। प्रीयतां अनेन सद्गुरु भगवान श्री रङ्गावधूतः इति।।**

**वल्लभविद्यानगर** **शास्त्री जयेन्द्र दवे**

**गुरुपौर्णिमा दिनांक २२/७/२०१३, सोमवार**

**श्रीगुरुः शरणम्।**

**श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री संहिता)**

# ग्रंथप्रवेश.

**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नमम्बासुतः स्तुतः। गन्धर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि।।**

**नमस्ते शारदे देवि वीणावादनतत्परे। सरस्वती जगन्माता सा मे बुद्धिं प्रचोदयात्।।**

**वासुदेवयतिं वन्दे वामनं मम सद्गुरुम्। कवीश्वरं च दत्ताख्यं याचे मतिप्रकाशनम्।।**

**वाङ्मयं वासुदेवस्य गहनं सागरादपि। चिंतनाय प्रवृत्तोऽस्मि मंदोऽप्यंतरशुद्धये।।४।।**

## श्रीगुरुचरित्र.

चौदाव्या शतकांत परधर्मीयांच्या आक्रमणांनी दक्षिण भारत व्यापून टाकला. बहामनी राजवटीने याच काळांत आपला जम बसविला होता. आक्रमणाला राजकीय आणि धार्मिक अशी दोन्ही अंगे होती. सनातन वैदिक धर्माच्या मुळावरच घाव बसत होते. धर्माचे आचरण, धर्माची मूलतत्त्वे आणि परंपरा या सर्वांनाच ग्लानि आली होती. एकीकडे हिंदू राजांची सत्ता कोलमडत होती तर दुसरीकडे समाजाला धर्माचे मार्गदर्शन करणारा ब्राह्मणवर्गच आचारभ्रष्ट होऊं लागला होता. *'यदा यदा हि धर्मस्य..'* या गीतावचनानुसार ईश्वरी अवतार प्रकट झाले. प्रथम आंध्र प्रदेशांत पूर्वसागराच्या जवळ पीठापूर येथे आचाराने आणि ऐहिक समृद्धीने संपन्न अशा ब्राह्मण कुळांत श्रीपादश्रीवल्लभ यांचा अवतार झाला. हाच श्रीदत्तात्रेयप्रभूंचा कलियुगांतील पहिला अवतार मानला जातो. श्रीपादश्रीवल्लभांच्या नंतर कांही दशकांत (इ.स. १३७८) श्रीदत्तप्रभूंचा द्वितीय अवतार श्रीनृसिंहसरस्वती यांचा जन्म झाला. या दोन्ही अवतारांचे कार्य परस्परपूरक असे झाले आहे.

यांनी हिंदू समाजाच्या सर्व घटकांच्या धार्मिक श्रद्धा तर दृढ केल्याच, पण तत्कालीन मुसलमान समाजावरही त्यांचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः ब्राह्मण समाजाला त्यांच्या धार्मिक जबाबदाऱ्यांची जाणीव करून देऊन आणि त्यांच्यात *'धर्मो रक्षति रक्षितः'* हा आत्मविश्वास निर्माण करून मुसलमानी धर्माच्या आक्रमणाला आळा घातला. या दोन महान विभूतींचे कार्य ज्ञानेश्वर-नामदेव आदि समकालीन आणि एकनाथ-तुकाराम आदि आगामी साधुसंतांच्या कार्याला पूरक असेच झाले आहे. संत एकनाथमहाराजांचे सद्गुरु संत जनार्दनस्वामी हे श्रीनृसिंहसरस्वतींचे शिष्यच होते.

या दोन अवतारांचे, मुख्यतः श्रीनृसिंहसरस्वतींचे चरित्र हा श्रीगुरुचरित्राचा विषय आहे. श्रीगुरुचरित्राचे लेखक सरस्वती गंगाधर साखरे हे कर्नाटकांतील कडगंची (उत्तरकांची) ह्या गांवचे. त्यांचे वडील गंगाधर यांचे पणजोबा सायंदेव साखरे हे श्रीनृसिंहसरस्वतींच्या प्रमुख शिष्यांत गणले जातात. लेखकाने आपल्याला 'महाराष्ट्र भाषा' येत नाही असे म्हटले असले तरी या ग्रंथाच्या व्युत्पन्न भाषेवरून तो त्यांचा विनयच आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. ह्या ग्रंथांत एकही यावनी भाषेचा शब्द आलेला नाही हे एक वैशिष्टय आहे. मराठीचे आद्यकवि मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'चा प्रभाव या ग्रंथांत कांही ठिकाणी आढळतो. श्रीनृसिंहसरस्वतींचे आपण 'नामधारक' आहोंत असे सांगून हे चरित्र आपल्याला श्रीनृसिंहसरस्वतींचे संन्यासी शिष्य श्रीसिद्धसरस्वती यांनी सांगितले असे ते म्हणतात. हा ग्रंथ सिद्ध आणि नामधारक यांच्यांतील संवादरूपच आहे. श्रीनृसिंहसरस्वतींच्या जीवनांतील घटना मांडणे एवढेच या ग्रंथाचे प्रयोजन नाही तर त्यांनी पुनरुज्जीवित केलेल्या वैदिक धर्माची शिकवण, आचार आणि संस्कार यांचीही सविस्तर मांडणी त्यांत केली आहे. सरस्वती गंगाधरांचा वेद, स्मृती आणि पुराणे यांचा सखोल व्यासंग त्यांतून स्पष्टपणे दृग्गोचर होतो. हा ग्रंथ पुराणाच्या धाटणीने लिहिला आहे. आख्याने आणि उपाख्याने यांचे प्रसंगाने निवेदन आहे आणि त्यांतून मुख्यतः वर्णाश्रमधर्माची मूलतत्त्वे, उपासनापद्धति आणि आचार यांचे प्रतिपादन आहे. दत्तसंप्रदायाचे आणि त्यांतील श्रीगुरुभक्तीचे माहात्म्य विशेषत्वाने वर्णिले आहे. सरस्वती गंगाधरांची ओंवी बऱ्याच वेळां गद्यप्राय वाटते

आणि शब्दांचे लालित्य हे तिचे वैशिष्ट्य नाही. पण प्रसंगोचित साहित्यांतील नवरसांचा आविष्कार त्यांत आहे तसेच अर्थालंकारांचीही समर्पक योजना केलेली आहे.

अर्थात साहित्यगुणांुळे हा ग्रंथ लोकप्रिय झाला असे नाही. ह्या ग्रंथांची प्रासादिकता - ईश्वराचा प्रसाद प्राप्त करून देण्याची क्षमता, विलक्षण आहे. प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आपल्या द्विसाहस्री ग्रंथाच्या उपसंहारांत या ग्रंथाचे वर्णन असे करतात. **'तत्संवादमयं ग्रंथं धर्म्यं गंगाधरात्मजः। सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत् तारकं सुधीः। यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूतरक्षामुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः। सप्ताहं तत्पाठिते शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति।।(२३ः११६-११७)** सिद्धमुनी आणि सरस्वती यांच्या संवादात्मक हा ग्रंथ जिथे कुठे नुसता ठेवलेला असला तरी भूत-प्रेत-पिशाचादि दुष्ट शक्तींचा नाश करतो. याचें सप्ताह पठण किंवा श्रवणही केले असतां दत्तात्रेय भगवान अभीष्ट कामना पुरवतात. इ.स. १४३८ च्या आसपास सिद्ध झालेल्या ह्या ग्रंथाची पारायणे असंख्य भक्तांनी करून आपले इष्ट प्राप्त करून घेतले आहे. आणि आजही करीत आहेत. साहजिकच दत्तसंप्रदायांत या ग्रंथाला वेदतुल्य मान आहे. ह्या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी वेदमंत्र उद्धृत केले असल्याने मुंज झालेल्या ब्राह्मणालाच हा वाचतां येतो. पण इतरांना हा ऐकतां येतो. स्त्रियांना हा ग्रंथ पठण करतां येत नाही; पण त्यांना तो ऐकतां येतो. या ग्रंथाला प्रदक्षिणा घालूनही याच्या प्रसादाचा लाभ अनेक स्त्रियांनी घेतला आहे आणि घेत आहेत.

### प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती यांचा पहिला ग्रंथ.

कदाचित् याच कारणामुळे ह्या ग्रंथांतील लौकिक आशयाकडे दुर्लक्ष झाले असावे. केवळ साहित्यकृती म्हणून किंवा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून याचे समीक्षण अलीकडेच झाले आहे. अर्वाचीन (१८५४ - १९१४) दत्तावतार मानले जाणारे महान संत प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांनी या ग्रंथावर संस्कृत आणि प्राकृत रचना करून त्यांतील धार्मिक प्रतिपादनांचे, तात्त्विक प्रमेयांचे आणि श्रीगुरूंच्या लीलांचे विवरण केले आहे. त्यांतून या ग्रंथाचे

वैदिक संप्रदायाशी असलेले दृढ नाते स्पष्ट करून त्याचे श्रुति-स्मृति-पुराणांच्या परंपरेतील स्थान विशद केले आहे. तसेच भागवत संप्रदाय आणि श्रीमच्छंकराचार्यांचा अद्वैत संप्रदाय यांच्याशी असलेल्या दत्तसंप्रदायाच्या अतूट संबंधाचेही दिग्दर्शन केले आहे.

या ग्रंथांपैकी सर्वांत प्रथम झालेला ग्रंथ म्हणजेच 'श्रीगुरुचरितम्'. माणगांवला असतांना (इ.स. १८८४) श्रीदत्तप्रभूंची श्रीवासुदेवशास्त्रींना (प.प. टेंबे स्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमींचे नांव) संस्कृतमध्ये गुरुचरित्र लिहिण्याची दत्तप्रभूंची आज्ञा झाली. त्या वेळी शास्त्रीबुवांचे संस्कृत अध्ययन माणगांवांतच अगदी जुजबी झाले होते. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे संस्कृत भाषांतर आपल्याला कसें जमणार?' असा विचार बुवांच्या मनांत आलाही; पण 'लिहायला आरंभ करा,' अशी दत्तप्रभूंची आज्ञा झाली. आश्चर्य म्हणजे ग्रंथ अवघ्या बारा दिवसांत लिहूनही झाला. ह्या ग्रंथाचे लेखन चालू असतांना शास्त्रीबुवांचे एक भक्त सावंतवाडीचे नारोपंत यांनी ते लेखन पाहिले. ते बुवांपेक्षा वयाने वडील असून त्यांनी बुवांना लहानपणापासून पाहिले होते. त्यांनी बुवांना विचारले की, 'बुवा! तुमचे संस्कृतचे फारसे अध्ययन नसतांनाही ही संस्कृत काव्यरचना कशी करूं शकतां?' त्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, 'मी कुठे हा ग्रंथ लिहितो? मला जशी अक्षरे दिसतात तशींच मी कागदावर उतरून काढतो.' यावरून सहजच असे अनुमान निघते की हा ग्रंथ अपौरुषेय असून श्रीस्वामीमहाराज हे त्याचे द्रष्टे आहेत.

वर सांगितल्याप्रमाणे अवघ्या बारा दिवसांत ग्रंथ पूर्ण झाल्यावर शास्त्रीबुवांच्या कानांवर 'संहितेयं द्विसाहस्री' असे श्रीदत्तगुरूंचे शब्द कानांवर पडले. तेव्हां कुतूहलाने ग्रंथाचे श्लोक मोजून पाहतां ती संख्या दोन हजारांपेक्षां बरीच कमी भरली. 'श्रीदत्तप्रभूंचे सांगणे कसे चुकेल?' असा विचार करून बुवांनी दुर्गासप्तशतीच्या गणनेप्रमाणे अर्धश्लोक, उवाच हेही त्यांत मोजल्यावर संख्या बरोबर दोन हजार भरली. तेव्हांपासूनच या ग्रंथाला 'द्विसाहस्री' या नांवानेच सर्व ओळखूं लागले. हा ग्रंथ मंत्रात्मक असल्याची ती साक्षच होती. नंतर तो ग्रंथ वाचून पाहतांना बुवांना त्यांत व्याकरणाचे वगैरे

कांही दोष वाटले म्हणून ते दुरुस्त करण्यासाठी लेखणी उचलली तेव्हां, 'हे झाले आहे तसेच मला आवडले आहे. त्यांत बदल करू नये. शिवाय अन्य व्याकरणानुसार (पाणिनीव्यतिरिक्त) ते शुद्धच आहे.' अशी स्पष्ट आज्ञा झाली. तेव्हां महाराजांनी तो ग्रंथ तसाच ठेवला. या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी प्राचीन चांद्र व्याकरणाचे प्रयोग आढळतात. दत्तप्रभूंनी ते मान्य केल्याने साहजिकच हे आर्ष प्रयोग ठरतात.

अर्थात श्रीगुरुचरित्राच्या तुलनेत हे संक्षिप्त भाषांतर काव्यगुणांत खूप सरस आहे. विविध वृत्तांतून रसपोष करण्याची श्रीस्वामिमहाराजांची हातोटी विलक्षण आहे. यमक, प्रास (उदा. शिष्टं कुष्टं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः।) आदि शब्दालंकार विपुल आहेत. भक्ति किंवा शांत रस हा जरी प्रधान रस असला तरी प्रसंगानुसार करुण, हास्य आदि रसांचीही योजना केली आहे. बावीसाव्या अध्यायांत शेत कापणाऱ्या पतीला अडविणाऱ्या स्त्रीला तो मारायला धावतो तेव्हां ती पळतांना तिच्या पायांखालची माती केसांचे चूर्ण झाली (निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत्।।) असे विनोदी चित्र ते उभे करतात. सोळाव्या अध्यायांतील सावित्रीच्या विलापांतील करुणरस हृदयस्पर्शी आहे. बऱ्याच ठिकाणी अर्थांतरन्यासांतून सुभाषिते पेरण्याचे कौशल्य दिसून येते. उदा. 'लोकाः स्वकर्मसूत्रोथा वृथाहंकारसंश्रिताः।।', 'मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भिषजे गुरौ यादृशी भावना यस्य सिद्धिस्तु तादृशी।।', 'लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः' इत्यादि.

**द्विसाहस्रीची रचना.**

मूळ गुरुचरित्रांत ५२ अध्याय (अवतरणिका धरून) व ७३०० हून अधिक श्लोक आहेत. द्विसाहस्रीत तेवीस अध्याय आहेत. अर्थात संस्कृत भाषेच्या वैशिष्टयामुळें कमीत कमी शब्दांत अधिकांत अधिक आशय मांडण्यांत श्रीस्वामी महाराज यशस्वी झाले आहेत. त्यांनी एकाक्षरी कोशाचाही सढळ हाताने उपयोग केलेला दिसतो. यांतही चौथ्या अध्यायांत मूळ गुरुचरित्रांत नसलेला यदु, प्रह्लाद आणि कार्तवीर्य यांना केलेला उपदेश आहे. श्रीस्वामीहाराज

स्वतःच या अध्यायाला 'क्षेपक' अध्याय म्हणतात. या तेवीस अध्यायांखेरीज द्विसाहस्रींत आरंभीं १११ श्लोकांची श्रीगुरुस्तुति आहे. मूळ गुरुचरित्रात दत्तात्रेय देवतेचे स्वरूप, त्यांच्या उपासनापद्धति आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये ह्यांचा फारसा विचार केलेला नाही. ह्या प्रकरणांत श्रीमहाराजांनी दत्तात्रेय, त्यांचे स्वरूप, त्यांची उपासना, त्यांची सर्वसुलभता इत्यादींचे विवरण केले आहे. ग्रंथाच्या शेवटी दत्तसंप्रदायाचे वैशिष्ट्य मानल्या गेलेल्या अष्टांगयोगाच्या दिग्दर्शनासाठी योगरहस्य, तसेच शांकर अद्वैताच्या मांडणीसाठी बोधरहस्य ही दोन प्रकरणे जोडली आहेत. ही द्विसाहस्रीची रचना दुर्गासप्तशतीच्या रचनेसारखीच आहे. वर निर्देश केल्याप्रमाणे गणना करितां सातशें श्लोक आणि तीन रहस्ये दुर्गासप्तशतीत दिसून येतात.

## त्रिकांडात्मक रचना

वैदिक परंपरेला अनुसरून भगवद्गीतेप्रमाणे गुरुचरित्राचीही रचना ज्ञान, कर्म आणि उपासना अशी त्रिकांडात्मक आहे हे श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्रीची रचना तशी केल्यावरच इतर अभ्यासकांच्या ध्यानांत आले. श्रीमहाराज टीकेच्या समारोपांत स्वतःच म्हणतात, **'ज्ञानं त्रयोदशाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः। पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट्।।'** पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोग, नंतरच्या पांच अध्यायांत कर्मयोग आणि शेवटच्या पांच अध्यायांत भक्तियोग अशी रचना योगिराज दत्तप्रभूंनी करविली. यानुसार श्रीगुरुचरित्राची रचना पाहतां अध्याय २४ पर्यंत ज्ञानकांड, ३७ पर्यंत कर्मकांड आणि ५१ पर्यंत भक्तिकांड अशी होते. श्रीगुरुसंहिता (समश्लोकी) या आपल्या ग्रंथांत श्रीस्वामीमहाराजांनी अशीच योजना केली आहे.

## द्विसाहस्रीची टीका.

मूळ द्विसाहस्री वर सांगितल्याप्रमाणे गृहस्थाश्रमांत इ.स. १८८४ त लिहून झाली. १८९१ साली पत्नीच्या मृत्यूनंतर वयाच्या ३५ व्या वर्षी गंगाखेड येथे वासुदेवशास्त्रींनी संन्यास घेतला. १८९८ साली चिखलदा येथे आठवा चातुर्मास

करून श्रीस्वामीमहाराज प्रभासपट्टण येथे आले असतां त्यांना दत्तप्रभूंची द्विसाहस्रीवर टीका लिहिण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे पंधरा वर्षांनंतर आपल्या ग्रंथावर स्वामीमहाराजांनी स्वतःच टीका (याला स्वोपज्ञ टीका म्हणतात) लिहिण्यास आरंभ केला. मूळ ग्रंथ या वेळी समोर नव्हता. तरी केवळ स्मरण करूनच या टीकेचे लेखन झाले हे विशेष होय. ही टीका द्वारकेत श्रीमहाराजांच्या आठव्या चातुर्मासांत पूर्ण झाली. यासंबंधी प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात, 'समष्ट्यात्मक भगवत्स्वरूपाशी संलग्न झालेल्या सत्पुरुषांच्या विशालबुद्धीला अगम्य असें कांहीच नाही.' श्रीस्वामीमहाराजांनीच लिहिले आहे कीं नऊ अध्यायांची टीका प्रभास क्षेत्रांत झाली व शेष सर्व अध्यायांची द्वारकेंत झाली. **(पाश्चात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताखिलानां। श्रीद्वारकायां चरितस्य तस्य सद्गुरोर्वेदनुतस्य तस्य।।)** टीकेनंतर या ग्रंथांची चूर्णिका म्हणजे सरल गद्य अनुवादही द्वारकेतच झाला.

**पदच्छेदः पदार्थोक्ति विग्रहो वाक्ययोजना, आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् ।।** या उक्तीप्रमाणे वाक्याची पदें पाडणे, त्यांचा अर्थ सांगणे, संधी सोडवणे, वाक्याचा अर्थ लावणे आणि आक्षेपांचे समाधान करणे ही व्याख्यानाची (टीकेची) पांच लक्षणे आहेत. पण श्रीस्वामीमहाराजांची टीका यांच्याही पुढे जाऊन स्वतंत्र मताचे प्रतिपादनही करते. त्यामुळे ती भाष्य या संज्ञेला पात्र ठरते. **(सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुसारिभिः। स्वपदानि च वर्ण्यते भाष्यं भाष्यविदो विदुः)** ह्या टीकेच्या माध्यमांतून श्रीस्वामी महाराजांनी श्रीगुरुचरित्राचे सिद्धांत स्पष्ट करून त्यांची श्रुति-स्मृति-पुराणांशीं संगति दर्शविली आहे. तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा (वेदांत) या षड्दर्शनांच्या, आणि गुरुचरित्रांतील प्रमेयांची एकवाक्यता विशद केली आहे. गीता-भागवत या ग्रंथांतीलच तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन गुरुचरित्रांत कसे अनुस्यूत आहे तेही स्पष्ट केले आहे. पर्यायाने श्रीदत्तसंप्रदाय हा कसा भागवतसंप्रदायांतच अंतर्भूत आहे तेही दर्शविले आहे. गुरुचरित्रांतील वेदांत हा श्रीमच्छंकराचार्यांच्या अद्वैतमताला कसा अनुसरून आहे हेही श्रीस्वामीमहाराजांनी विशद केले आहे. अर्थातच ही टीका लिहितांना वेदशास्त्रादि १७०हून

अधिक ग्रंथाचे संदर्भ उद्धरणासहित दिलेले आहेत. हे केवळ स्मरणशक्तीच्या आधारेच दिलेले आहेत. 'मूळ गुरुचरित्रांत नसलेले कांही विषय द्विसाहस्रींत आल्याचे वर आपण पाहिलेच आहे. असेच अनेक विषय टीकेंतही श्रीस्वामीमहाराजांनी हाताळलेले आहेत. श्रीगुरुचरण 'प.पू.गुळवणीमहाराजां'नी यांतील कांही उदाहरणे दिली आहेत. 'माया कां मानावी? ईश्वर पक्षपाती आहे काय? जगाचे अस्तित्व व नास्तित्व हे अध्यारोपापवादात्मक कसे आहे? कर्माचा ज्ञानाला कसा उपयोग होतो? कर्माचरण कसे केले असतां चित्त शुद्ध होते? ईश्वरावतारांचे स्वरूप काय व ते कसे होतात? ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांतच गेले पाहिजे किंवा एकदम संन्यासाश्रमांत जातां येईल? संन्यासाश्रम घेतल्यावर शिष्यप्रशिष्यपरंपरा कां चालूं ठेवावी? जीवन्मुक्ताची आंतरस्थिति कशी असते? तीर्थयात्रा कां करावी? सद्गुरुसेवा सर्वांनीच कां करावी? शरीरांतून जीव जातो कां प्राणवायु जातो, शरीरस्थिति मुख्यतः कोणावर अवलंबून आहे? अविद्येपासून उत्पन्न झालेले कर्म तीच अविद्या घालविण्यास कसे कारणीभूत होते? ब्रह्मज्ञानी पुरुषाने कर्म टाकावे काय? एकाच जन्मांत सर्व कर्मफलांचा भोग संपवून मुक्त होणे शक्य आहे काय? पतिपत्नीसंबंध, गुरुशिष्यसंबंध, स्वामिसेवकसंबंध इत्यादि कसे निर्माण होतात व ते कसे दूर होतात? बंधक असलेली काम्यकर्मे वेदांत कां सांगितली? मनुष्य, पितर, देव यांची कालगणना कशी करावी? चंद्रकलांचे स्वरूप काय? गायत्री मंत्राचा अर्थ काय? त्या मंत्राचे इतके महत्त्व कां? आपत्कालांत कसे वागावे? मुख्य ज्ञानयोग व त्याचे साधन कर्मयोग यापेक्षां तिसरा भक्तियोग कशाला पाहिजे? भगवंताकडूनच वेदाज्ञेचे उल्लंघन झाल्यास तें योग्य कां अयोग्य? साकाराच्या भक्तीने मोक्ष कसा मिळेल? शूद्र हा श्रौतविद्येचा अधिकारी आहे कीं नाही? त्याला मुक्ति कशी मिळेल? रोगादि दुःखांचे खरें कारण कोणतें व त्यांचा परिहार कसा होऊं शकेल?'

अशा रीतीने द्विसाहस्री ह्या ग्रंथांत दत्तसंप्रदायाच्या तात्त्विक बैठकीची सप्रमाण संस्थापना झाली आहे. त्याचप्रमाणे दत्तोपासनेच्या विविध परिमाणांचे सूत्रात्मक दिग्दर्शनही आहे. ह्या ग्रंथांत प्रतिपादलेल्या मूलतत्त्वांचाच विस्तार

श्रीमहाराजांनी आपल्या विशाल वाङ्मयांत पुढे केलेला कुणाही विचक्षण वाचकाला दिसून येईल.

**फलश्रुति.**

श्रीगुरुचरित्राची प्रासादिकता आपण वर पाहिलीच आहे. श्रीस्वामीमहाराजांच्यासारख्या अवतारी महात्म्याने श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच केलेल्या ह्या त्याच्या संस्कृत रूपांतरांतही ती प्रासादिकता उतरली असल्यास नवल नाही. ग्रंथाच्या समारोपांत महाराजश्री म्हणतात, ' **स एवात्रेयगोत्रोत्थगणेशब्रह्मपुत्रगाः। पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रंथात्मा तारकोऽव्ययः।।** ' तोच (सरस्वती गंगाधरलिखित) श्रीगुरुचरित्रग्रंथरूपी तारक आणि अव्यय दत्तात्रेय अत्रिगोत्रोत्पन्न गणेशब्राह्मणाच्या पुत्राची वाणी पावन करीत इथे विराजत आहे. श्रीगुरुचरित्राच्या पठणाने वा श्रवणाने होणाऱ्या ऐहिक आणि आमुष्मिक कल्याणाचीच ही ग्वाही आहे. त्यानुसार अनेक दत्तभक्त या ग्रंथाची उपासना करून आपले जीवन कृतार्थ करीत आहेत. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतींच्या प्रश्नावलीत या ग्रंथाची फलश्रुति अशी सांगितली आहे.

**देईल तो इष्टसिद्धी वासुदेव यतीश्वर। 'द्विसाहस्री' गुरुकथा सप्ताहें दूर हो दर।।**

श्रीगुरुचरित्राप्रमाणेच या ग्रंथाचेही सप्ताह करून इष्टसिद्धि पावणारे हजारों दत्तभक्त आजही आहेत. 'केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे।' या समर्थोक्तीनुसार हा श्रद्धेचा आणि अनुभवाचा विषय आहे.

**द्विसाहस्रीची हवनीयता.**

ह्या ग्रंथाला 'द्विसाहस्री संहिता' असे नांव देतांना दत्तप्रभूंनीच हा सामान्य ग्रंथ नसून मंत्रमय संहिता आहे असा संकेत दिलेला दिसतो. अर्थात् त्याकडे श्रीमहाराजांनी (बहुतेक हेतुपुरःसर) दुर्लक्ष केले. यांत त्यांचे अमानित्वच दिसून होते. हे सगळे मान्य करणे म्हणजे स्वतःकडे ऋषित्व घेणे ठरले असते. श्रीमहाराजांच्याकडून ह्या ग्रंथाच्या हवनाचा पुरस्कार होत नाही हे पाहूनच बहुधा दत्तप्रभूंनी महाराजांचे सावंतवाडीचे ऋणानुबंधी व शिष्य आणि महान्

दत्तभक्त श्री. नारोपंत उकिडवे यांना स्वप्नदृष्टांतांत संस्कृत गुरुचरित्राचा स्वाहाकार करण्याची आज्ञा केली. नारोपंतांनी आपली आर्थिक अडचण दत्तप्रभूंना निवेदन केली. तेव्हां त्यांनी पैशांची व्यवस्था कुणाकडून होईल ते सांगितले व त्या गृहस्थांनी स्वाहाकाराचा सर्व खर्च करण्याची तयारीही दाखविली. एवढ्यांत सावंतवाडीत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. पुन्हां नारोपंतांना स्वप्न झाले की 'प्लेग थांबेल, तुम्ही स्वाहाकाराची तयारी करा.' नारोपंतानी ही स्वप्नांत झालेली आज्ञा त्यावेळी पवनीस चातुर्मासानिमित्त असलेल्या श्रीस्वामीमहाराजांना कळविली. त्यावेळचे श्रीस्वामिमहाराजांचे पत्र असे आहे.(अ.श्रावण शु।।७, शके १८३१).

'रा.रा.नारायण उकिडवे सावंतवाडी यांस नारायण. हल्ली विजयवाड्यातून आपले पूर्वी पाठविलेले पत्र पोचले. जे स्वप्न झाले ते सद्गुरूंनी दाखविले. मंत्रशास्त्रांत मनुष्यांनी केले अनार्ष ग्रंथ यांचे अनुष्ठान करूं नये असे आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्याचा कोणी सांगावा व हा ग्रंथ मी केला असाही अभिमान. श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो, पण स्वाहाकार करा असे अनुमोदन द्यावे अशी प्रवृत्ती होत नाही. गुरुचरित्र स्वाहाकाराविषयी स्वतः निराधार. कांहीच सांगतां येत नाही. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कांही अप्रामाणिक बोलतां येत नाही. कळावे. नारायण.'

ह्या पत्राचा विचार करतां कांही गोष्टी स्पष्ट होतात. मुख्य म्हणजे नारोपंतांना झालेला दृष्टांत दत्तप्रभूंनीच दिलेला आहे ह्याला श्रीस्वामीमहाराजांनी दुजोरा दिला आहे. मानवनिर्मित अनार्ष ग्रंथांचा स्वाहाकार करण्याबद्दल साशंकता प्रकट केली आहे. तसेच गुरुचरित्राचा स्वाहाकार नव्यानेच करण्याचा प्रस्ताव असल्याने त्याला आधीचे कांही प्रमाण वा आधार नाहीत. त्यामुळे ह्याविषयी कांही सांगण्यास आपण असमर्थ आहो असा अभिप्राय दिसतो. हा ग्रंथ आपणच केला असल्याने अभिमानाची भीतीही श्रीस्वामीमहाराजांना वाटली आहे. इतके असूनही ह्या पत्रांत हे हवन करूं नका असे निक्षून न म्हणता 'श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो.' असे म्हटले आहे. ह्या हवनाला संमति देण्याची मात्र श्रीमहाराजांच्या मनाची तयारी नव्हती. श्रीगुरुचरित्राच्या हवनाचा आत्यंतिक निषेध ह्या पत्रांत आढळत

नाही. अनार्ष ग्रंथाच्या अनुष्ठानाच्या निषेधाबद्दलही त्यांनी मंत्रशास्त्राचा हवाला दिला आहे. इथे हे विचारणीय आहे की श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वीपासूनच दुर्गासप्तशती, भागवतपुराण इत्यादी ग्रंथांचे हवन प्रचलित होते. त्याचा श्रीस्वामीमहाराजांनी निषेध केल्याचे ऐकीवांत नाही.

विशेष गोष्ट अशी आहे की आपल्या सद्गुरूंचे हे पत्र आल्यावर नारोपंतांनी हवनाचा विचार सोडून दिला. तरीही भगवान दत्तात्रेयांनी त्यांना पुन्हां स्वप्नद्वारा आज्ञा केली कीं, 'ज्योतीपंतांनी भागवताचा स्वाहाकार केला तसा तू संस्कृत गुरुचरित्राचा कर.' ह्या दृष्टांतांत खरे तर श्रीस्वामीमहाराजांच्या आक्षेपाचे स्पष्ट उत्तर होते. तसेच देवता, निर्वाप, हवनप्रकार यांचीही सूचना होती. नारोपंतांच्या अनन्य गुरुभक्तीचे खरेच कौतुक करायला हवे की वारंवार दत्ताज्ञा होऊनही त्यांनी पुन्हां श्रीस्वामीमहाराजांना पत्रद्वारे विचारणा केली. अपेक्षेप्रमाणे पुन्हा सद्गुरूंचे नकारात्मक पत्र आले. त्यांत 'तुम्हांला कांही कर्तव्य असल्यास १० पारायणे करून ब्राह्मणभोजन घाला.' अशी आज्ञा झाली. कांही अनुष्ठानच न करण्याच्या पूर्वीच्या भूमिकेत पडलेला हा फरक लक्षणीय आहे.

गेल्या ३०-४० वर्षांत द्विसाहस्रीसह श्रीस्वामीमहाराजांच्या अनेक ग्रंथांची हवने त्यांच्या संप्रदायांतील भक्तांनी आयोजित केली आहेत. ह्यापैकी नारेश्वरवासी संत पू. श्रीरंग अवधूत महाराजांच्या शिष्यांचा विशेष पुढाकार दिसतो. तेथील प्रमुख विश्वस्त व श्री. प.प. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. हरिप्रसाद (धीरुभाई) जोशी यांच्या पत्रानुसार द्विसाहस्री गुरुचरित्राचा पहिला स्वाहाकार भरूच येथे त्यांचे पिताश्री व श्रीरंगअवधूतांचे अंतरंग शिष्य पू. श्री शिवप्रसाद जोशी यांच्या पुढाकाराने झाला. हा स्वाहाकार करावा किंवा नाही असा प्रश्न श्रीस्वामीमहाराजांना विचारून प्रार्थनापूर्वक चिठ्ठ्या टाकण्यांत आल्या. त्यांचा होकारार्थी कौल मिळाल्याने स्वाहाकार करण्यांत आला. पू. शिवप्रसाद हे प्रसिद्ध कर्मकांडी असल्याने त्यांनी केलेल्या विधानानुसार हा स्वाहाकार झाला. श्रीदत्तप्रभूंच्या अवतारांची संख्या लक्षांत घेऊन सोळा ऋत्विज हवनाला बसतात. 'द्रां दत्तात्रेयाय नमः' हा पल्लव

लावण्यात येतो. हविर्द्रव्य म्हणून त्रिमधुप्लुत पायसाचा प्रयोग केला जातो. यानंतर अनेक ठिकाणी या संहितेची हवने झाली आहेत. त्यांपैकीं कांहीत लेखकालाही सहभागी होण्याचे भाग्य लाभले आहे.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट आहे की हा ग्रंथ - नव्हे ही संहिता, श्रीदत्तप्रभूंच्या संकल्पानेच सिद्ध झालेली आहे. प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात त्याप्रमाणे हा श्रीदत्तराजांचा ग्रंथावतारच आहे आणि त्याचे 'श्रवण, मनन, निदिध्यासनरूपाने नित्य सेवन करणे' हे सर्व आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू साधकांच्या परमकल्याणाला कारणीभूत ठरणारे आहे. या ग्रंथाच्या मूळ संहितेची मराठी व हिंदी भाषांतरे उपलब्ध आहेत. पण टीकेचे भाषांतर उपलब्ध नव्हते. (अगदी अलीकडेच टीकेचेही एक मराठी भाषांतर पहाण्यांत आले आहे.) त्यासाठी या ग्रंथाचा तसेच टीकेचाही भावार्थ समजून घेण्याचा ह्या ग्रंथांत प्रयत्न केला आहे. प्रस्तुत लेखकाला त्याच्या सीमित क्षमतांची तीव्र जाणीव आहे. ह्या ग्रंथाचा यथार्थ बोध होण्यासाठी आवश्यक असलेली योग्यता लेखकांत अंशतःसुद्धां नाही. पण आपल्या शक्त्यनुसार जे व जेवढे समजेल ते सुबोध प्रकारे सांगण्याचा हा प्रयत्न आहे. निरूपण हा अध्ययनाचाच एक प्रकार आहे. ही त्या ग्रंथात्म्याची सेवाच आहे. सिद्ध ग्रंथांचे वाचन चित्तशुद्धिकारक असल्याने ते अनधिकार व्यक्तीचेही कल्याणच करते ह्या श्रद्धेने केलेले हे लेखन आहे. या प्रयत्नांतून आपल्या अंतःकरणांत त्यांतील आशय अंशतः उतरला तरी हा उद्यम सफल होईल अशी काकुळती आहे. प्रथम मूळ संहितेचे श्लोक देऊन त्यांचा अन्वय खाली दिला आहे. त्यानंतर श्लोक व श्रीस्वामिमहाराजांची टीका यांचा मराठी अनुवाद दिला आहे. कांही ठिकाणी श्रीमहाराजांनी केवळ संकेताने दर्शविलेले संदर्भ मोजक्या शब्दांत स्पष्ट करण्याचाही प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांच्या आशयाला धरूनच हा प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांनी दिलेले व्याकरणाचे संदर्भ मात्र वगळले आहेत. त्यामुळे भावार्थाच्या आकलनात काहीं त्रुटी जाणवणार नाही अशी आशा आहे. विद्वज्जनांना बऱ्याच ठिकाणी प्रस्तुत अनवादकाच्या ज्ञानाच्या मर्यादा दिसून येतील. त्यांनी उदार मनाने त्यांची उपेक्षा करून नीरक्षीरन्यायाने श्रीस्वामिमहाराजांचे प्रमेयरूपी सार ग्रहण

करावे अशी प्रार्थना आहे. वाक्सेवेद्वारे लेखक आणि वाचक उभयतांचेही कल्याण व्हावे हीच श्रीगुरुचरणीं प्रार्थना!

'द्विसाहस्री गुरुचरितम्' हा ग्रंथ प.पू. योगतपस्वी श्रीनारायणकाका ढेकणे महाराज यांच्या प्रेरणेने कार्यरत असलेल्या 'श्रीवासुदेवनिवास स्वाध्याय मंडळांत वाचला आणि चर्चिला गेला आहे. लेखकाला त्याचा बोध होण्यांत मंडळाच्या सदस्यांच्या योगदानाचे ऋण इथे नमूद करणे आवश्यक वाटते. ह्या स्वाध्याय मंडळाच्या माध्यमांतून हे निरूपण आपल्या गुरुपरंपरेला सादर केल्याचे समाधान आम्हांला लाभले आहे. २०१४ इ.स. च्या आषाढ शुक्ल प्रतिपदेला प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज यांची शंभरावी पुण्यतिथि येत आहे. सर्व भारतांत पुढील वर्ष 'समाधीशताब्दि' महोत्सव वर्ष म्हणून साजरे होत आहे. ह्या पर्वणीत हा ग्रंथ प्रकाशित होत आहे हा समष्टीचा एक शुभ संकेतच आहे. त्यांचे हे कार्य त्यांनीच सिद्धीला न्यावे अशी प्रार्थना करूं या.

या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना ते लिखाण श्रीनरसोबावाडीचे वे.मू.डॉ.बाळकृष्ण महादेव जमदग्नि यांच्या निदर्शनास आले. डॉ. जमदग्नि हे प.पू. वक्रतुंडबुवा यांनी सुरूं केलेल्या परंपरेनुसार वाडी येथे श्रीस्वारी(उत्सवमूर्ति)पुढे पुराणसेवा करीत असतात. हे लिखाण त्यांना आवडून त्यांनी ते श्रींच्यापुढे पुराणरूपाने वाचून दाखविले. हा मी भक्तवत्सल भक्ताभिमानी श्रीदत्तप्रभूंचा या लेखनसेवेला लाभलेला आशीर्वादच मानतो. डॉ.जमदग्नि यांनी, तसेच वल्लभविद्यानगर (आणंद) येथील प. पू. श्रीरंग अवधूत महाराजांचे शिष्य विद्वान, व्यासंगी व गुरुभक्त शास्त्री डॉ.जयेंद्रभाई दवे यांनीही ह्या लिखाणाचे परिशीलन करून, महत्त्वपूर्ण सूचना केल्या आहेत व माझा उत्साह आपल्या आत्मीयतेने वाढविला आहे. डॉ.जमदग्नि यांनी परिश्रमपूर्वक मुद्रितांच्या शोधनाचेही कार्य केले आहे. हे दोन्ही विद्वान् दत्तभक्त द्विसाहस्री संहितेचे 'उपजीवी' आहेत. त्यांच्या योगदानाने ह्या ग्रंथाचे मोल वाढले आहे.

ह्या ग्रंथाचे प्रकाशन प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा, श्री अवधूत निवास

ट्रस्ट, नारेश्वर,  आणि श्रीवासुदेवनिवास, पुणे या संस्थांच्या आर्थिक साह्यानेच शक्य झाले आहे. श्रीवासुदेवनिवासाचे प्रमुख विश्वस्त प.पू. पं. शरदभाऊ जोशी यांनी वेळोवेळी दिलेल्या उत्तेजनाचा आणि प्रकाशनासाठी घेतलेल्या पुढाकाराचा इथे विशेष उल्लेख केला पाहिजे. श्रीवासुदेवनिवासच्या विश्वस्तमंडळानेही ह्या कार्याला उत्तम प्रतिसाद दिला आहे. नारेश्वरच्या अवधूतनिवास ट्रस्टचे व प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. डॉ.हरिप्रसाद (धीरूभाई) शिवप्रसाद जोशी यांनी आत्मीयतेने केलेल्या मार्गदर्शनाचा आणि भरघोस साह्याचा प्रस्तुत लेखक सदैव ऋणी राहील. श्रीवासुदेव प्रबोधिनीचे सभासद आणि पदाधिकारी यांनी दहा वर्षे लेखकावर जो लोभ केला आहे त्याचाच हा ग्रंथ एक आविष्कार आहे. या सर्वांचा मी सदैव ऋणी राहीन. या संस्थांच्या आर्थिक सहकारानेच प.पू. योगिराज श्रीगुरुमहाराज यांनी घालून दिलेल्या पायंड्याप्रमाणे, जवळपास ७०० पृष्ठांच्या ह्या ग्रंथाचे मूल्य केवळ २००रु. ठेवणे शक्य झाले आहे.

मे.के.जोशी आणि कंपनी, पुणे हे श्रीवासुदेवनिवास, पुणे यांच्यशी दीर्घकाल संबंधित आहेत आणि भक्तपरिवारांपैकीं आहेत. त्यांनी नेहमीच्या आपुलकीने, तत्परतेने आणि कुशलतेने ह्या ग्रंथाचे उत्तम मुद्रण केल्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

यांत लेखक व वाचक या दोघांचाही लाभ होईल अशी अपेक्षा आहे. द्विसाहस्रीरूप ग्रंथात्म्याची ही सेवाच आहे. प.पू.सद्गुरु योगिराज श्रीगुळवणीमहाराजांनी ती मान्य करावी आणि आपल्या कृपेची साउली निरंतर आमच्यावर धरावी हीच प्रार्थना!

**वासुदेव व्यंकटेश देशमुख.**
एउ१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ,
औंध, पुणे ४११००७. भाद्रपद शुक्ल ९, शके १९३५.

## प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी.

'नयन चेंबर्स', २रा मजला, पारकर वाडा, दांडिया बाजार, वडोदरा. दूरध्वनि- ०२६५-२४३१५६९
श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, एरंडवणे, कर्वे पथ, पुणे ४११००७. दूरध्वनि ०२०-२५४५५५८४

महान् दत्तावतारी संत प.प.श्री. वासुदेवानंदसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराज यांचे जीवन, कार्य आणि वाङ्मय यांचा प्रचार तसेच प्रसार करण्याच्या हेतूने, १९ ऑक्टोबर, २००२ कोजागिरी पौर्णिमेच्या के शुभ दिनी, श्रीमहाराजांचे पावन समाधिस्थान श्रीगरुडेश्वर येथे, भारतांतील प्रमुख श्रीदत्तसंस्थांच्या प्रतिनिधिनींनी प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनीची स्थापना केली. साठ वर्षांपूर्वी हैद्राबाद (आं.प्र) येथे श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दीच्या उत्सवांत त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचे प्रकाशन करीत असतां प.पू. योगिराज श्री. वामनरावजी गुळवणी महाराज यांनी अशा प्रकारची एक अखिल भारतीय संस्था असावी असा विचार व्यक्त केला होता. त्याच्या आधारेच या प्रबोधिनीची प्रमुख उद्दिष्टे निश्चित करण्यात आली. (१) प.प. थोरल्या महाराजांच्या समग्र ग्रंथांचे प्रकाशन. (२) ह्या ग्रंथांचे विविध भाषांत अनुवाद. (३) संगणक, इंटरनेट इत्यादि आधुनिक माध्यमांतून श्रीस्वामीमहाराजांच्या जीवन, कार्य आणि साहित्य यांचा प्रसार. (४) श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचे अध्ययन आणि संशोधन यांचा विद्यापीठे आणि महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत व्हावा असा प्रयत्न करून, त्या त्या संस्थांना आवश्यक सहकार्य देणे. (५) ह्या प्रबोधिनीत अधिकाधिक श्रीदत्त संस्थानांना समाविष्ट करून श्रीस्वामीमहाराजांच्या साहित्याचे प्रकाशन, प्रचार व वितरण यांकरिता त्यांचे साह्य मिळविणे. ह्या सर्व संस्थांना एका सौहार्दपूर्ण सूत्रांत गठित करून श्रीदत्तसंप्रदायाच्या विकासासाठी कार्यान्वित करणे. (६) श्रीस्वामीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल झाला आहे. ज्या स्थानांत महाराजश्रींचा निवास झाला - विशेषतः त्यांचे चातुर्मास जिथे जिथे संपन्न झाले, त्या स्थानांत त्यांचे स्मारक निर्माण

करून  नित्य पूजा तसेच महाराजांच्या वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रचाराची सोय करणे.

आज अकरा वर्षानंतर या प्रबोधिनीच्या कार्याची फळे दृग्गोचर होत आहेत. प.प.श्रीटेंबे स्वामी महाराजांचे उपलब्ध सर्व मराठी व संस्कृत ग्रंथ आतां प्रबोधिनीच्या संलग्न संस्थांतून उपलब्ध आहेत. तसेच ते www. shrivasudevanandsaraswati.org या इंटरनेट स्थळावरही उपलब्ध आहेत. श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे मराठी व गुजराती अनुवाद पूर्वीपासूनच उपलब्ध आहेत. आतां द्विसाहस्री, दत्तमाहात्म्य व पंचपाक्षिक या ग्रंथांचे हिन्दी अनुवाद प्रकाशित झाले आहेत. श्रीस्वामिमहाराजांच्या प्रमुख संस्कृत ग्रंथांची तेलुगु आणि कानडी लिपीतील संस्करणे निघाली आहेत. अधिकाधिक भाषांतून श्रीमहाराजांच्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठी प्रबोधिनी प्रयत्नशील आहे. सांप्रतच्या श्रीस्वामींच्या समाधिशताब्दि वर्षात भारतभर विशेष कार्यक्रमांचे आयोजन होत आहे.

प्रबोधिनीच्या ह्या पुण्यकार्यांत सर्व स्वामिभक्तांनी आणि दत्तभक्तांनी सहभागी व्हावे अशी विनंति या निवेदनाद्वारे आम्ही करीत आहो. यथाशक्ति द्रव्यसेवा, वाङ्मयीन सेवा, सामूहिक तसेच वैयक्तिक उपासना इत्यादि प्रकारे या देवकार्यांत योगदान करावे. अकरा हजार किंवा अधिक रकमेचे दान देणाऱ्यांना प्रबोधिनीचे आश्रयदाता होतां येते. तसेच पांचशे रुपये देणाऱ्यांना आजीव सदस्यत्व मिळते. उदार आणि सत्प्रवृत्त दत्तभक्तांना आवाहन आहे की प.प.श्रीस्वामीमहाराजांच्या दत्तसमर्पित जीवनांतून प्रवाहित झालेल्या ह्या दत्तभक्तीच्या पावन गंगेत अधिकतम योगदान करून परमश्रेय साधून घ्यावे.

**प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीविरचितं**

**श्रीगुरुचरितम्। सटीक मराठी भाषांतर.**

## अनुक्रमणिका.

(विषयांपुढील कंसांतील आंकडे श्लोकांचे आहेत)

### श्रीगुरुस्तुतिः। : १-३३ :



### ज्ञानयोगः।

### प्रथमोऽध्यायः। चरितानुसंधानम्। : ३४-६२ :

## द्वितीयोऽध्यायः। गुरुशिष्यचरितानुकथनम्। : ६३-८० :

नामधारकाची सिद्धमुनीशी भेट व संवाद (१-६) : सद्गुरूंचे माहात्म्य व संशयाचा भक्तीला अडसर (७-१०) : युगनिरूपण आणि कलीला ब्रह्मदेवाचा उपदेश (११-२१) : दीपकाची गुरुसेवा (२२-४७) : दीपकाला विष्णूंचे वरदान आणि त्याच्यावर गुरूंची कृपा (४८-५७) : दीपकाख्यानाचा समारोप (५८-६३).

## तृतीयोऽध्यायः। दत्तावतारकथनम्। : ८१-१०१ :

गुरुकथा भवसागरांतील नौका (१-७): अत्रि आणि अनसूया (८-१३) : नारदकृत अनसूयास्तवनाने रुष्ट देवींच्या शांतवनासाठी ब्रह्मा, विष्णु आणि महेश अत्रिऋषींच्या आश्रमांत (१४-१६) : अनसूयेच्या पातिव्रत्यप्रभावाने तिन्ही देवांना बालकत्व.(१७-२४) : अनसूयेच्या दुधाने तीनही देवांची तृप्ती.(२५- ३०) : अत्रिऋषीकृत स्तुति.(३१-३४) : तिघांचे अत्रि आणि अनसूया यांना वरदान आणि तिघांचे नामकरण. (३५-४१) : अंबरीषाची कथा. (४२-५७).

## चतुर्थोऽध्यायः। दत्तलीलाकथनम्। : १०२-१४३ :

श्रीदत्त-यदुसंवाद ‘अवधूतगीता’. (१-४०) : प्रह्लादावर अनुग्रह. (४१-४४) : कार्तवीर्याला अष्टांगयोग आणि आत्मज्ञान यांचा उपदेश. (४५-५७).

## पञ्चमोऽध्यायः। श्रीपादावतारः। : १४४-१५९

उपोद्घात (१-२) : परमेश्वर पक्षपाती आहे कां?(२-४) : सुमतिब्राह्मणीला पुत्रप्राप्तीचे वरदान (५-१४) : श्रीपादांचा जन्म (१५-२१) : श्रीपादश्रीवल्लभांचा मातेला उपदेश आणि गृहत्याग (२२-२५) : दोन्ही भावांच्या व्यंगांचा परिहार.(२६-२७) : मातेला स्वरूपदर्शन, (२७-३२) बंधूना उपदेश, काशीला प्रयाण. (३३-३६).

## षष्ठोऽध्यायः। गोकर्णवर्णनम्। : १६०-१७४

मातेसाठी रावणाचा कैलास आणण्याचा उद्यम.(१-५) : रावणाच्या संगीतसेवेने शंकराकडून प्राणलिंगाचे दान.(६-१२) : रावणाला फसवून गोकर्णांत लिंगाची स्थापना.(१३-३१) : मित्रसह राजाची कथा.(३२-३७) : चंडालीचे आख्यान.(३८-५१) : गोकर्णमाहात्म्य.(५२-५४).

## सप्तमोऽध्यायः। श्रीपादमहिमावर्णनम्। : १७५-१८७

विद्वान् ब्राह्मणाच्या मंदमति मुलाची कथा (१-११) : शनिप्रदोषाचे आख्यान (१२-२७) : अंबिकेच्या पुत्राला वरदानाने सुविद्य केले.(२८-३०): अंबिकेच्या प्रदोषव्रताचे फल देण्यासाठी पुनरावतार (३१-३६): ब्राह्मण व्यापारी भक्ताचे चोरांपासून रक्षण (३७-४७): कुरुगड्डीचे आणि श्रीपादश्रीवल्लभांच्या भक्तीचे माहात्म्य (४८-५०).

## अष्टमोऽध्यायः। श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनम्। : १८८-२१५

अंबिकेचा पुनर्जन्म आणि माधवब्राह्मणाशी विवाह.(१-६) : धर्माला अनुकूल कामाचे अनिंद्यत्व (७) : नृसिंहसरस्वतींचा अवतार, जन्मतः ॐकाराचा उच्चार (८-१५): बाल्यावस्थेतील चमत्कार आणि लीलेने मूक राहणे.(१६-२१): लोहाचे सोने करून मुंज लावण्याचा मातापित्यांना संकेत.(२१-२४) : उपनयनानंतर लगेच वेदपठण (२५-२६) : संन्यासाठी आईवडिलांच्या अनुज्ञेची मागणी (२७-२९) : दुःखी मातेला उपदेश.(३०-४१) : मातेला आपल्या स्वरूपाचे दर्शन, पुत्रप्राप्तीचे वरदान; मातेने केलेली स्तुति.(४२-४५) : मातेच्या इच्छेनुसार एक वर्ष घरी राहून शिष्यांना अध्यापन.(४६-४७) : आईला जुळे झाल्यावर काशीला प्रयाण (४८-५२) : काशीतील तपाचरण आणि तेथील संन्याशांची प्रार्थना (५३-५७) : कृष्णसरस्वतींकडून संन्यास घेऊन संन्यासमार्गाचा प्रसार.(५८-६०) : महावाक्यांसहित संन्यासधर्माचा आणि योगाचाउपदेश (६१-६७) : गुरुपरंपरा (६८-७७).

## नवमोऽध्यायः। तीर्थयात्रोद्देशः। : २१६-२४३ :

श्रीगुरूंचे शिष्य (१-४) : कारंजाला मातृदर्शन (५-११) : भगिनीशी संवाद (१२-१५) : गोदातीरावर संचार (१६-१७) : पोटशूळार्त ब्राह्मणाला अभय. (१८-२५) : सायंदेवाच्या घरीं भिक्षाग्रहण. (२६-४०) : सायंदेवाचे यवनापासून रक्षण (४१-४८) : उपासनानिरूपण (४९-५४) : योगभूमी आणि सद्गुरुमहिमा (५५-५७) : आश्रमधर्माचे निरूपण. (५८-६९) : तीर्थयात्रानिरूपण. (७०-८३).

## दशमोऽध्यायः। गुरुभक्त्यनुशासनम्। : २४४-२५५ :

गुरूच्या त्यागाच्या दोषाचे निरूपण. (१-८) : गुरूचे स्वरूप (९-१०) : धौम्य ऋषी आणि त्यांच्या तीन शिष्यांची कथा.(११-३६) : गुरुत्यागी ब्राह्मणाचा उद्धार (३७-४४).

## एकादशोऽध्यायः। कृष्णापञ्चगङ्गासङ्गमोत्कर्षकथनम्। : २५६-२७२ :

विद्येचे माहात्म्य (१-४) : मंदबुद्धी ब्राह्मणाचा भुवनेश्वरीसमोर जिह्वाछेद.(५-६) : देवीच्या आज्ञेने त्याची श्रीगुरूंकडे शरणागती. (७) : त्याच्यावर श्रीगुरुप्रसाद.(८-१०) : श्रीगुरूंचे कृष्णापंचगंगासंगमावर आगमन. (११-१६) : घेवड्याचा वेल कापून ब्राह्मणाचे दारिद्र्यहरण.(१७-२६) : श्रीगुरूंची भिक्षावृत्ती. (२७-२८) : औदुंबरमाहात्म्य. (२९-३२) : गंगानुजावर अनुग्रह.(३३-४२) : गंगानुजाला त्रिस्थळीयात्रा. (४३-४६) : कृष्णापंचगंगासंगमाचा उत्कर्ष व गाणागपूरास गमन. (४७-५५).

## द्वादशोऽध्यायः। प्रेतसंजीवनम्। : २७३-२९४ :



## त्रयोदशोऽध्यायः। भीमामरजासङ्गमनिवासः। : २९५-३०८ :



## कर्मयोगः। चतुर्दशोऽध्यायः। वेदोपदेशः। : ३०९-३२९ :



## पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाकः। : ३३०-३५१ :

## षोडशोऽध्यायः। मृतसंजीवनम्। : ३५२-३८३ :

श्रेयस् आणि प्रेयस् मार्ग.(उपोदघात) : सद्गुरूंच्या अगम्य लीला.(१-३) : गोपीनाथाचा पुत्र दत्त याची कथा.(४-१८) : गाणगापुरांत प्रवेश करतांना त्याचा मृत्यू आणि सावित्रीचा शोक.(१९-३०) : साधूच्या रूपांतील श्रीगुरूंचा सावित्रीला उपदेश.(३१-३९) : स्त्रियांचे धर्म. (४०-५७) : विधवाधर्मनिरूपण. (५८-६५) : सहगमनाचे माहात्म्य. (६६-७०) : सावित्रीचा सहगमनाचा निर्धार. (७१-८१) : सहगमनापूर्वी श्रीगुरूंच्या दर्शनाला गेलेल्या साध्वीने केलेली स्तुति. (८२-८४): सावित्रीच्या पतीचे संजीवन. (८५-९९).

## सप्तदशोऽध्यायः। दम्पतीगुरुसंवादः। : ३८४-४०९ :

रुद्राक्षधारणाचा महिमा.(१-७) : वेश्यासतीचे उपाख्यान. (८-२२) : रुद्राध्यायाचे माहात्म्य. (२३-४१) : स्त्रियांना मंत्राचा उपदेश करूं नये याविषयी कचाख्यानाचे निरूपण.(४२-६७) : सोमवारव्रत आणि सीमंतिनीचे उपाख्यान.(६८-१०६).

## अष्टादशोऽध्यायः। कर्मकाण्डकथनम्। : ४१०-४६२ :

परान्नत्यागी ब्राह्मणाच्या कर्कशा पत्नीचा स्वभावपालट.(१-१०) : परान्नाविषयी ग्राह्याग्राह्य विचार. (११-२०) : पराशरप्रणीत कर्ममार्गनिरूपण. (२१-२५) : आचारधर्माची परिभाषा. (२६-५०) : शौच आणि स्नान. (५१-६७) : भस्म, मृत्तिका, चंदन, मुद्रिका यांचे धारण (६८-७२) : आचमन.(७३-८१) : संध्यावंदन. (८२-१०२) : गायत्रीमंत्राचा जप. (१०३-१०८) : गुरूंचे अभिवादन. (१०९-११२) : अग्नीची उपासना. (११३-११८) : गृहशुद्धि. (११८-१२१) : देवपूजा. (१२२-१४५) : ब्रह्मयज्ञ. (१४६-१४८) : तर्पण. (१४९-१५१) : वैश्वदेव आणि बली. (१५२-१५५) : भोजनविधि. (१५६-१७४) : निद्रा.(१७५-१७९) : संभोग. (१८०-१८५) : विचाराचार. (१८६-१८८).

## भक्तियोगः। एकोनविंशोऽध्यायः। भक्तिमहिमावर्णनम्। : ४६३-५०१ :

सर्वसाधनसाधक भक्ति. (१-६) : भास्करब्राह्मणाची कथा.(७-३०) : अश्वत्थमहिमा. (३१-४८) : साठ वर्षांच्या वंध्येला पुत्रप्राप्ती. (४९-७३) : कुष्ठी नरहरी ब्राह्मणाची कथा.(७४-८४) : शबराची शिवभक्ति.(८५-९८) : शुष्क काष्ठाला पालवी आणि नरहरीचा कुष्ठपरिहार. (९९-१०१) : नरहरीकृत श्रीगुरुस्तोत्र. (१०२-११०) : समारोप.(१११-११६).

## विंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५०२-५३० :

सायंदेवाची परीक्षा.(१-२३) : गुरुसेवेची दुष्करता.(२४-२८) : त्वष्टापुत्राची कथा आणि काशीयात्रानिरूपण. (२९-५६) : सायंदेवकृत नृसिंहसरस्वतीस्तोत्र.(५७-६६) : अनंतव्रताचे निरूपण.(६७-१११).

## एकविंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५३१-५५५ :

तंतुकभक्ताला श्रीशैल्यदर्शन आणि श्रीशैल्यमाहात्म्य.(१-३६) : देवीच्या निरोपाने आलेल्या नन्दी ब्राह्मणाचा कुष्ठपरिहार.(३७-५६) : अवशिष्ट कुष्ठ जाण्यासाठी श्रीगुरूंच्या आज्ञेने त्याने केलेली स्तुति. (५७-९१) : नरहरी कवीला कल्लेश्वराठायीं दर्शन आणि अनुग्रह.(९२-१०३).

## द्वाविंशोऽध्यायः। क्षेत्रमाहात्म्यवर्णनम्। : ५५६-५८४ :

भगवंताचे भक्तवात्सल्य आणि भक्तपराधीनता.(१-१२) : आठ रूपांनी आठ भक्तांच्या गांवी दिवाळी साजरी.(१३-३३) : शेतकरी भक्ताचे शेत अमाप पिकविले.(३४-७२) : गाणगापूरच्या अष्टतीर्थांचे निरूपण. (७३-१०२).

## त्रयोविंशोऽध्यायः। : ५८५-६१९ :

पाप-तापहारी श्रीगुरुचरित्र मोक्षाहूनही ग्राह्य.(१-९) : कुरुगड्डीच्या परीटाला राज्याचे वरदान.(१०-१८) : त्याचा बिदरचा राजा म्हणून पुनर्जन्म.(१९-२६) : स्फोटकग्रस्त राजाला ब्राह्मणाचा उपदेश व ऋषभमुनींची कथा.(२७-६५) : म्लेच्छ राजाच्या स्फोटकाचे शमन.(६६-७७) : म्लेच्छ राजाच्या गांवी गमन व त्याचा उद्धार.(७८-१०५) : श्रीशैलयात्रा व गाणगापुरच्या मठांत शाश्वत वास.(१०६-११२) : ग्रंथाचा उपसंहार आणि मंगलाचरण.(११२-११८).

## योगरहस्यम्। : ६२०-६४० :

## बोधरहस्यम्। : ६४१-६६३ :

## सप्ताहपाठपद्धति -

प्रथमेऽह्नि, चतुर्थाध्यायांत, द्वितीये नवमाध्यायांत, तृतीये चतुर्दशाध्यायान्त, पंचमे एकोनविंशाध्यायन्त, षष्ठे एकविंशाध्यान्त, सप्तमे त्रयोविंशाऽध्यायान्त पठित्वा रहस्यद्वयं पठेत्। प्रत्यहमादौ ग्रन्थपूजनोत्तरं श्रीवैष्णवेत्यादिस्तुतयः पठेत्। अन्ते चोत्तरपूजनं कृत्वा 'रसज्ञा वशे'त्यपराधक्षमापनस्तोत्रं पठेत्।

पहिल्या दिवशीं यथाविधि संकल्प करून तसेच ग्रंथपूजन करून वाचनाला आरंभ करावा. प्रतिदिनी आरंभी श्रीगुरुस्तुति वाचावी व मग त्या दिवशींचे अध्याय वाचावेत. **१ल्या दिवशी ४थ्या अध्यायापर्यंत, २न्या दिवशी ९ अध्यायापर्यंत, ३न्या दिवशी १४व्या अध्यायापर्यंत, ४थ्या दिवशी १७ व्या अध्यायापर्यंत, ५ व्या दिवशी १९ व्या अध्यायापर्यंत, ६ व्या दिवशी २१ व्या अध्यायापर्यंत आणि ७ व्या दिवशी २३ व्या अध्यायापर्यंत वाचून योगरहस्य आणि बोधरहस्य वाचून उत्तरपूजा करावी.** वाचनानंतर रोज 'रसज्ञा वशा तारकं स्वादु लभ्यं..' हे क्षमापराधनस्तोत्र वाचावे. पारायणकालांत श्रीगुरुचरित्राच्या पारायणाचे सर्व शुचिता-आहार-विहारादि नियम पाळावेत.

**या ग्रंथाचे मराठी भाषांतर स्त्रियांना वाचण्यास हरकत नाही.**

या ग्रंथाचे एकाह्न पारायणसुद्धां करतां येते. संकल्प व ग्रंथपूजन करून श्रीगुरुस्तुतीपासून आरंभ करून बोधरहस्यापर्यंत वाचन पुरे झाल्यावर रसज्ञा वशा  स्तोत्राचा पाठ करून उत्तरपूजा करावी.

# श्रीगुरुस्तुतिः

मंगलाचरण

**श्रीवैष्णवैशगाणेश-सौर्यशाक्त्यादिरूपधृक् । दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनन्तः सदा मे हृदि सद्गुरुः ॥१॥**
**योऽजोऽनन्तोऽगुणोऽरूपो निस्तृडेकोऽक्रियोऽसृजत् । विश्वं धृत्वा षोडशांशं पुंरूपं योगमायया ॥२॥**
**दृश्यते ज्ञानदृष्ट्या यत्सहस्राक्षिशिरोऽङ्घ्रि सत् । रूपं यदङ्गसंस्थानैर्लोकव्यासः प्रकल्प्यते ॥३॥**

श्री+वैष्णव+ऐश+गाणेश+सौर्य+शाक्त्य+आदि+रूप+धृक् अजः अनन्तः दत्तात्रेयः सदा मे हृदि अस्तु।१। यः अजः अनन्तः अगुणः, अरूपः, निस्तृट्, एकः अक्रियः योग+मायया षोडश+अंशं पुं+रूपं धृत्वा विश्वं असृजत्।२। यत् (पुंरूपं) सहस्र+अङ्घ्रि+शिरः सत् रूपं ज्ञानदृष्ट्या दृश्यते। यत्+अङ्ग+संस्थानैः लोक+व्यासः प्रकल्प्यते।३।

पहिला श्लोक हे देवतावाचक मंगल आहे. *देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः। सर्वे ते नैव निंद्याः स्युर्लिपितो गणितोपि वा। मंगलाचरणं शिष्टाचारात्फलदर्शनाच्छ्रुतितश्च।* (सांख्यदर्शन ५।१). ज्ञान, ऐश्वर्य आदि वैभवाने युक्त अशा विष्णु, शिव, गणेश, सूर्य, देवी (शक्ति) तसेच इंद्र, अग्नि (आदि) मूर्ति आपल्या मायेच्या सामर्थ्याने धारण करणारे पण तत्त्वतः अनादि आणि अनंत असणारे सद्गुरू दत्तभगवान् नित्य माझ्या चित्तांत असोत.१.

**दत्तात्रेयांचे स्वरूप.** असा जो जन्मरहित, अनंत, निर्गुण, निरिच्छ, एकमेवाद्वितीय, अक्रिय परमात्मा त्याने आपल्या योगमायेने सोळा अंशांचे (११ इंद्रिये आणि पंचमहाभूते) विराट पुरुषरूप धारण करून विश्व निर्माण केले. अनंत पाय आणि अनंत शिरे असलेले ते स्वरूप (योगीजनांनाच) ज्ञानचक्षूंनी दिसते. या विराट रूपाच्या अवयवांपासूनच पातालादि लोकांचा विस्तार झाला आहे.२-३.

**नानावतारबीजं यदनन्तं यत्कलामुखैः । देवतिर्यङ्मुखं सृष्टमस्वतन्त्रं जगत्पुरु ।।४।।**
**गोभिः स्वार्थादानमीश-सृष्टं नेशात्परं क्वचित् । देहेन्द्रियात्मजीवोत्थौ रागद्वेषावियन्तु भित् ।।५।।**
**भूतेट् सोऽजोऽव्ययात्मापि संभवत्यात्ममायया । श्रेयोऽर्हसाधुगुप्त्यै स्वप्रकृतिस्थो युगे युगे ।।६।।**

यत् अनन्तं नाना+अवतार+बीजम्। यत्+कला+मुखैः देव+तिर्यक्+मुखं अस्वतन्त्रं पुरु जगत् सृष्टम्।४। गोभिः स्व+अर्थ+आदानं ईश+सृष्टम्। ईशात् परं न क्वचित्। देह+इन्द्रिय+आत्म+जीव+उत्थौ राग+द्वेषौ इयं तु भित्।५। सः भूत+ईट् अजः अव्ययः अपि आत्म+मायया स्व+प्रकृति+स्थः श्रेयः+अर्ह+साधु+गुप्त्यै युगे युगे संभवति।६।

ह्याच अनेक अवतारांच्या बीज असलेल्या अनंत स्वरूपाने आपल्या ब्रह्मदेव, मरीचि आदि कलांच्या द्वारा देव-तिर्यगादि योनींनी युक्त अशा अपरिमित अशा जगताची निर्मिति केली.४. (ह्या जगांत) इंद्रियांची आपापले विषय ग्रहण करण्याची क्षमता परमेश्वरानेच निर्मिली आहे. सर्वांचे अधिष्ठान अशा ईश्वराखेरीज (ह्या सृष्टीत) कांहीच नाही. तरी पण देह आणि इंद्रिये यांच्याशी तादात्म्य होऊन त्यांच्या अभिमानाने जीवाला राग (आकर्षण) आणि द्वेष प्राप्त झाले. हेच भेदाचे मूळ होय. म्हणजेच जीवसृष्टी आणि ईश्वरसृष्टी असा भेद भासू लागला. ह्या भेदामुळेच जीव आपल्या सच्चिदानंदैकरस स्वरूपाला विसरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी अशी विपरीत भावना करतो.५. तोच सर्व भूतांचा ईश्वर, अजन्मा आणि अक्षर असूनही, आपल्या आपल्या प्रकृतीचा, म्हणजेच मायेचा आश्रय करून, मोक्षाला योग्य अशा साधूंच्या रक्षणासाठी जन्म घेतो. *(अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया।।.. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।। श्री.भ.गी.४।६, ८.)*६.

**श्रुत्वा तत्कर्म निर्द्वन्द्वो मुच्यते कर्मबन्धनात् । न तथा कर्मसिद्धीप्सुर्द्वन्द्वात्मा भ्रान्तहृन्नरः ।।७।।**
**गुणकर्मभिदा सृष्ट-चातुर्वर्ण्यस्य सोऽव्ययः । कर्ताप्यकर्ता यैर्ज्ञातो बध्यन्ते कर्मभिर्न ये ।।८।।**
**भूभारभूततद्द्वेष्य-घाताय विविधास्तनूः । धृत्वा कण्टकवन्मत्वा कृतकार्यो जहात्यसौ ।।९।।**
**अस्यैवापूर्णकृत्याः स्युस्तन्वस्तासूत्तमोत्तमा । तनुरेकास्ति दत्ताख्या कृपासूः स्मर्तृगामिनी ।।१०।।**

तत्+कर्म श्रुत्वा निर्द्वन्द्वः (यथा) कर्म+बन्धनात् मुच्यते तथा कर्म+सिद्धि+ईप्सुः द्वन्द्व+आत्मा भ्रान्त+हृत् नरः न (मुच्यते)।७। गुण+कर्म+भिदा सृष्ट+चातुर्वर्णस्य सः अव्ययः कर्ता अपि यैः अकर्ता ज्ञाता, ये कर्मभिः न बध्यन्ते, भू+भार+भूत तत्+द्वेष्य+घाताय असौ विविधाः तनूः धृत्वा कृत+कार्यो कण्टकवत् मत्वा जहाति।८-९। अस्य एव अपूर्ण+कृत्याः तन्वः स्युः। तासु एका उत्तम+उत्तमा कृपासूः स्मर्तृ+गामिनी तनुः अस्ति।१०।

त्या (त्या अवतारांच्या साधुरक्षणात्मक) चरित्राचे निष्कामतया श्रवण केल्याने साधु जसा कर्मबंधनांतून सुटतो तसा कर्मफलाची अभिलाषा करणारा भ्रांतचित्त श्रवणपराङ्मुख असाधु मुक्त होत नाही.७. सत्त्व, रज आणि तम हे गुण आणि शमादि कर्म यांच्या भेदानुसार चार वर्णांची निर्मिती करणारा तो परमात्मा असंग आणि उदासीन असल्याने अकर्ताच आहे असे जाणल्याने स्वकर्मांनी जे बांधले जात नाहीत,८. त्या (साधूंचा) द्वेष करणारे, भूमीला भारभूत झालेले जे दुष्ट, त्यांचा विनाशासाठी विविध शरीरे धारण करून हा प्रभू (त्या त्या अवतारांचे) कार्य पूर्ण होतांच त्यांना (कांटा काढण्यासाठी घेतलेल्या) कांट्याप्रमाणे टाकून देतो. त्या त्या देहांचे विसर्जन करतो.९.

**अवताररहस्य.** (असे जर आहे तर नर, नारायण, नारद, सनक इत्यादि कसे चिरंजीव आहेत अशी शंका अपेक्षून महाराज सांगतात) ज्यांचे कार्य अजून अपूर्ण आहे असे ह्या ईश्वराच्या अनेक मूर्ति आहेत. त्यांतीलच एक उत्तमोत्तम श्रीदत्त या नांवाची तनू कृपाळू आणि स्मर्तृगामी अशी आहे.१०.

**मुक्तैर्मुमुक्षिभिश्चान्यैर्ध्येया नान्येदृशी कलौ । कामदा यस्य कस्यापि स्मृतिगामिन्यनुक्षणम् ।।११।।**
**विश्वं ततान योऽव्यक्तस्तद्यत्स्थं यो न तत्स्थितः । तद्यत्स्थं नैश्वराद्योगात्तद्भृत्तत्स्थो न वायुवत् ।।१२।।**
**मावशाद्योऽवशोऽभीक्ष्णं व्यसृजत्तदबंधनः । येनाध्यक्षेण मा सूते जगद्वेदामलं न यम् ।।१३।।**
**नृरूपेणावतीर्णं यत्तत्त्वाज्ञोऽसुरभावगः । न वेत्ति योगगम्यं यं सद्धर्मत्राणकारणम् ।।१४।।**

कलौ मुक्तैः मुमुक्षुभिः च अन्यैः ध्येया ईदृशी कामदा, अनुक्षणं स्मृतिगामिनी अन्या न।११। यः अव्यक्तः विश्वं ततान, तत् यत्स्थं, यः न तत्+स्थितः। तत् न यत्+स्थं ऐश्वरात् योगात् वायुवत् तत्+भृत् न तत्+स्थः।१२। मा+वशात् यः अवशः अभीक्ष्णं तत् अबन्धनः व्यसृजत्। मा येन अध्यक्षेण जगत् सूते यं अमलं न वेद।१३। यत्+तत्त्व+अज्ञः असुर+भाव+गः नृ+रूपेण+अवतीर्णं योगगम्यं सत्+धर्म+त्राण+कारणं न वेत्ति।१४।

मुक्त, मुमुक्षु आणि विषयी यांनी चिंतण्यायोग्य, स्मरणमात्रे संतोष पावून क्षणमात्रांत प्रत्येकाच्या कामना पुरविणारे कलियुगांत दुसरे दैवत नाही.११. विश्वाचा विस्तार करणारा तो ज्ञान, ऐश्वर्य, बल, तेज आणि वीर्यांनी युक्त असा अव्यक्त (परोक्ष) पुरुष ज्याच्या ठायीं ते (विश्व) स्थित आहे, त्यांचे पोषण करतो आहे. तरीसुद्धां जो जगाला धारण करणारा ईश्वर वायूप्रमाणे सर्वव्याप्त असूनही त्या विश्वांत स्थिरावत नाही. श्रीमच्छंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे मायेच्या अध्यासाने हे अखिल जगत् मी विस्तारलेले असल्याने ते सर्व जीव माझ्याच आधाराने स्थिर आहेत; पण मी त्यांच्यात नाही. शिंपल्यावर चांदीचा भास होतो. त्या शिंपल्यांतच चांदी आहे; पण चांदीत मात्र शिंपल्याचा अंशही नसतो. म्हणूनच भगवंत म्हणतात हे सर्व जीव माझ्यांत राहतात. हे सर्व इंद्रियगोचर जगत् इंद्रजालाप्रमाणे मिथ्या आहे.१२. मायेच्या योगाने पण मायेला वश न होता तिच्या बंधनाच्या पलीकडे असणारा (परमात्मा) ह्या वैविध्यपूर्ण जगाचे सृजन करतो. ज्याच्या आधिपत्याखाली माया ह्या जगताला जन्म देते; ते जगत् मात्र त्या शुद्ध ईश्वराला जाणत नाही.१३. त्या संत आणि धर्म यांच्या रक्षणासाठी मनुष्यरूपाने अवतरलेल्या योगगम्य भगवंताला, त्याचे तत्त्व न जाणणारे, आसुरी संपत्तीने अभिभूत झालेले (दुष्ट जीव) ओळखत नाहीत.१४.

**सोऽन्वर्थाख्यानसूयात्रिपुत्रो जज्ञेऽज ईश्वरः । अचिन्त्याव्यक्तरूपोऽपि दत्तोऽर्च्यः स्मृतितोषणः ।।१५।।**

**परानन्दमयो विष्णुर्हृत्स्थोऽवेद्योऽप्यतीन्द्रियः । सदा सम्पूज्यते भक्तैर्भगवान्  भक्तिभावनः ।।१६।।**

**अचिन्त्यस्य कुतो ध्यानं कूटस्थावाहनं कुतः। क्वासनं विश्वसंस्थस्य पाद्यं पूतात्मनः कुतः ।।१७।।**

**क्वानर्घोरुक्रमस्यार्घ्यं विष्णोराचमनं कुतः। निर्मलस्य कुतः स्नानं क्व निरावरणेऽम्बरम् ।।१८।।**

सः अनु+अर्थ+आख्यः अनसूया+अत्रि+पुत्रः ईश्वरः जज्ञे। अचिन्त्य+अव्यक्त+रूपः अपि स्मृति+तोषणः दत्तः अर्च्यः।१५। पर+आनन्द+मयः विष्णुः हृत्स्थः अवेद्यः अति+इन्द्रियः अपि भक्तिभावनः भगवान् भक्तैः सदा सम्पूज्यते।१६। अचिन्त्यस्य कुतः ध्यानम्? कूटस्थ+आवाहनं कुतः? विश्व+संस्थस्य क्व आसनम्? पूत+आत्मनः पाद्यं कुतः?।१७। अनर्घ+उरु+क्रमस्य अर्घ्यं क्व? विष्णोः आचमनं कुतः? निर्मलस्य कुतः स्नानं? निरावरणे अम्बरं क्व?।१८।

**दत्तात्रेयांच्या सगुण स्वरूपाची पूजनीयता.** स्वतःचेच दान करून आपले दत्त हे नाम सार्थक केलेला अनसूया आणि अत्रीचा पुत्रच ईश्वर आहे असे जाणा. अचिंत्य आणि अव्यक्त (मन आणि इंद्रियांच्या अतीत) रूपाच्या त्या स्मरणानेच संतुष्ट होणाऱ्या दत्ताचे पूजन करावे.१५. परमानंदस्वरूप तो विष्णु हृदयस्थ असूनही अतीन्द्रिय असल्याने जाणीवेच्या पलीकडे आहे. तरीही भक्तीने वश होणाऱ्या त्या भगवंताचे भक्तांनी श्रद्धेने नित्य पूजन केले पाहिजे.१६. **मानसपूजा.** ह्या मानसपूजेचा पूर्वार्ध श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या परापूजा ह्या स्तोत्राशी खूप जुळणारा आहे. अचिंत्याचे ध्यान कसे करतां येईल? अखंडतया एकरूपाने तिन्ही कालांना व्यापणाऱ्याचे आवाहन कसे करतां येईल?१७. ज्याचे पदकमल अनर्घ म्हणजे अमूल्य आहेत त्याला अर्घ्य कशाचे देणार? सर्वव्यापकाला आचमन काय द्यावे? शुद्धस्वरूपाला कुठले स्नान? आवरणातीताला वस्त्र कुठून आणावे?१८.

**स्वसूत्रस्य कुतः सूत्रं निर्मलस्य च लेपनम् । निस्तृषः सुमनोभिः किं किमक्लेद्यस्य धूपतः ।।१९।।**
**स्वप्रकाशस्य दीपैः किं किं भक्ष्याद्यैर्जगद्भृतः । किं देयं परितृप्तस्य विराजः क्व प्रदक्षिणाः ।।२०।।**
**किमनन्तस्य नतिभिः स्तौति को वागगोचरम् । अन्तर्बहिःप्रपूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ।।२१।।**
**सर्वतोऽपीत्यसंभाव्यो भाव्यते भक्तिभावनः । सेव्यसेवकभावेन भक्तैर्लीलानृविग्रहः ।।२२।।**
**तवेशातीन्द्रियस्यापि पारम्पर्याश्रुतां तनुम् । प्रकल्प्याश्मादावर्चन्ति प्रार्चयेऽर्चां मनोमयीम् ।।२३।।**

स्व+सूत्रस्य कुतः सूत्रम्? निर्मलस्य च लेपनम्? निस्तृषः सुमनोभिः किम्? अक्लेद्यस्य धूपतः किम्?।१९। स्व+प्रकाशस्य दीपैः किम्? जगत्+भृतः भक्ष्याद्यैः किम्? परितृप्तस्य किं देयम्? विराजः क्व प्रदक्षिणाः?।२०। अनन्तस्य नतिभिः किम्? वाक्+अगोचरं कः स्तौति? अन्तः+बहिः+परिपूर्णस्य उद्वासनं कथं भवेत्?।२१। इति सर्वतः अपि असंभाव्यः भक्तिभावनः लीला+नृ+विग्रहः भक्तैः सेव्य+सेवक+भावेन भाव्यते।२२। (हे) ईश, तव अति+इन्द्रियस्य अपि पारम्पर्या आश्रुतां तनूं अश्मादौ प्रकल्प्य अर्चन्ति। मनोमयीं अर्चां प्रार्चये।२३।

स्वसूत्राला (सर्वतंत्रस्वतंत्र अशा देवाला) सूत्र (यज्ञोपवीत) कुठले? निर्मलाला गंध लेपन कोणते द्यावे? तृष्णारहित परमात्म्याला फुलाचे काय महत्त्व? अक्लेद्य (पाण्याने न ओलावणाऱ्या) देवाला धूपाचा काय उपयोग? स्वयंप्रकाशाला दिवा कशासाठी दाखवावा? जगाचे पोषण करणाऱ्याला खाद्याची काय आवश्यकता? नित्यतृप्त भगवंताला काय दक्षिणा द्यायची? विराट पुरुषाला प्रदक्षिणा कशी करायची? अनन्ताला नमस्कारांनी काय होणार? आणि वाचेला अगोचर अशा देवाची स्तुति तरी कशी करणार? अंतर्बाह्य परिपूर्ण अशा ईश्वराचे विसर्जन कसे होईल?१९-२१. अशा सर्वतोपरी अकल्पनीय अशा भगवंताने लीलेने धारण केलेल्या नरदेहाची कल्पना करून, त्याला स्वामी मानून सेवकभावाने पुजावे; कारण तो भक्तीला पावतो.२२. (हे भगवंता) तूं अतींद्रिय असलास तरी गुरुपरंपरेने चालत आलेल्या पाषाणादि अष्टविध प्रतिमांनाच तुझे शरीर मानून अल्पबुद्धीचे भक्त पूजन करतात. मी ध्यानयोगासाठी, मनाची लवकर एकाग्रता होण्यासाठी ह्या आठ मूर्तींत उत्तम मानल्या गेलेल्या मानस मूर्तीचे तीव्रतेने पूजन करीत आहे.२३.

**कलसुश्लोकगीतेन भगवन्दत्त जागृहि । भक्तवत्सल सामीप्यं कुरु मे मानसार्चने ।।२४।।**
**श्रीदत्तं खेचरीमुद्रा-मुद्रितं योगिसद्गुरुम् । सिद्धासनस्थं ध्यायेऽभी-वरप्रदकरं हरिम् ।।२५।।**
**दत्तात्रेयाह्वयाम्यत्र परिवारैः सहार्चने । श्रद्धाभक्त्येश्वरागच्छ ध्यातधाम्नाञ्जसा विभो ।।२६।।**
**सौवर्णं रत्नजडितं कल्पितं देवतामयम् । रम्यं सिंहासनं दत्त तत्रोपविश यंत्रिते ।।२७।।**
**पाद्यं चंदनकर्पूर-सुरभि स्वादु वारि ते । गृहाण कल्पितं तेन दत्ताङ्घ्री क्षालयामि ते ।।२८।।**

(हे) भगवन् दत्त! कल+सुश्लोक+गीतेन जागृहि। (हे) भक्तवत्सल, मानस+अर्चने मे सामीप्यं कुरु।२४। सिद्ध+आसनस्थं खेचरी+मुद्रा+मुद्रितं अभी+वर+प्रदं योगि+सद्गुरुं हरिं ध्याये।२५। अत्र दत्तात्रेयाय परिवारैः सह अर्चने श्रद्धा+भक्त्या आह्वयामि। (हे) विभो ध्यात+धाम्ना अञ्जसा आगच्छ।२६। (हे) दत्त, सौवर्णं रत्नजडितं रम्यं देवतामयं सिंहासनं कल्पितम्। तत्र यंत्रिते (सिंहासने) उपविश।२७। चंदन+कर्पूर+सुरभि+स्वादु वारि ते पाद्यं कल्पितं, तेन (हे) दत्त, ते अङ्घ्री क्षालयामि।२८।

**मानसमूर्तीची षोडशोपचार पूजा** - **(प्रबोध)** आपल्या चित्ताकर्षक आणि सुंदर कीर्तीचे गुणगान असलेल्या गीतांनी, हे दत्तप्रभू, आपण जागे व्हा आणि हे भक्तवत्सला ह्या मानसपूजेत माझ्यासमीप रहा.२४. **(ध्यान)** सिद्धासनावर बसून खेचरी मुद्रा धारण केलेल्या तसेच हातांनी वर आणि अभय दर्शविणाऱ्या योग्यांच्या सद्गुरु श्रीदत्तांचे मी ध्यान करतो. इथे द्विभुज मूर्तीचे ध्यान अभिप्रेत दिसते. स्तुतीच्या अंतींचे सविस्तर ध्यानही दिगंबर आणि द्विभुज असेच आहे.२५. **(आवाहन)** श्रीदत्तात्रेयांना परिवारासह ह्या पूजेसाठी मी श्रद्धेने आणि भक्तीने आवाहन करतो. हे सर्वव्यापी देवा, आपण शीघ्र या ध्यानमूर्तींत या.२६. **(आसन)** हे दत्ता, मी आपल्यासाठी हे सुवर्णाचे, देवतामय, यंत्रयुक्त रम्य सिंहासन कल्पिलेले आहे. त्यावर विराजमान व्हा.२७. **(पाद्य)** चंदन, कापूर आणि केशर यांनी युक्त असे हे मधुर जल आपल्यासाठी पाद्य म्हणून कल्पिले आहे. त्याने आपले पाय मी धूत आहे.२८.

**गन्धाब्जतुलसीबिल्व-शमीपत्राक्षतान्वितम् । साम्ब्वर्घ्यं स्वर्णपात्रेण कल्पितं दत्त गृह्यताम् ॥२९॥**

**सुस्वाद्वाचमनीयाम्बु हैमपात्रेण कल्पितम् । तुभ्यमाचम्यतां दत्त मधुपर्कं गृहाण च ॥३०॥**

**पुष्पवासितसत्तैलमंगेष्वालिप्य दत्त भोः । पंचामृतैश्च गांगाद्भिः स्नानं ते कल्पयाम्यहम् ॥३१॥**

**भक्त्या दिगंबराचान्तजलेदं दत्त कल्पितम् । काषायपरिधानं तद् गृहाणैणेयचर्म च ॥३२॥**

**नानासूत्रधरैते ते ब्रह्मसूत्रे प्रकल्पिते । गृहाण दैवतमये श्रीदत्त नवतन्तुके ॥३३॥**

गन्ध+अब्ज+तुलसी+बिल्व+शमी+पत्र+अक्षता+अन्वितं सु+अम्बु स्वर्ण+पात्रेण कल्पितं (हे) दत्त, गृह्यताम्।२९। (हे) दत्त! तुभ्यं सुस्वादु आचमनीयं अम्बु हैम+पात्रेण कल्पितम्, आचम्यताम्। मधुपर्कं च गृहाण।३०। भोः दत्त! पुष्प+वासित सत्+तैलं अङ्गेषु आलिप्य। पंचामृतैः च गाङ्ग+अद्भिः अहं ते स्नानं कल्पयामि।३१। (हे) दत्त, भक्त्या कल्पितं इदं जलं आचान्त, काषाय+परिधानं तत् ऐणेय+चर्म च गृहाण।३२। (हे) नाना+सूत्र+धर श्रीदत्त, एते ते दैवतमये नवतन्तुके प्रकल्पिते ब्रह्मसूत्रे गृहाण।३३।

**(अर्घ्य)** गंध, अक्षता, बेल-तुलसी-शमी यांच्या पानांनी तसेच कमलाने युक्त पाण्याचे अर्घ्य मी सुवर्णपात्रांत कल्पिले आहे. ते आपण ग्रहण करा.२९. **(आचमन)** सोन्याच्याच कलशांत कल्पिलेले हे मधुर जल आपल्या आचमनासाठी आणले आहे. त्यांनी आचमन करून हा मधुपर्क घ्या.३०. **(स्नान)** हे दत्ता, विविध फुलांनी सुगंधित असे हे तेल आपल्या अंगाला लावून घ्या. पंचामृताने आणि गंगोदकाने आपल्याला मनाने न्हाऊं घालत आहे.३१. **(वस्त्र)** स्नानोत्तर मी भक्तीने कल्पिलेल्या ह्या पाण्याने आचमन करून हे भगवे वस्त्र धारण करा आणि हे मृगचर्म घ्या.३२. **(यज्ञोपवीत)** नानासूत्रधारी श्रीदत्ता, दैवतमय असे नऊ तंतूंचे मी कल्पनेने केलेले यज्ञोपवीत धारण करा.३३.

**भूतिमृत्स्नासुकस्तूरी-केशरान्वितचंदनम् । रत्नाक्षताः कल्पितास्त्वामलङ्कुर्वेऽथ दत्त तैः ।।३४।।**
**सच्छमीबिल्वतुलसी-पत्रैः सौगंधिकैः सुमैः । मनसा कल्पितैर्नानाविधैर्दत्तार्चयाम्यहम् ।।३५।।**
**लाक्षासिताभ्रश्रीवास-श्रीखण्डागरुगुग्गुलैः । युक्तोऽग्निियोजितो धूपो हृदा स्वीकुरु दत्त तम् ।।३६।।**
**स्वर्णपात्रे गोघृताक्त-वर्तिप्रज्वालितं हृदा । दीपं दत्त सकर्पूरं गृहाण स्वप्रकाशक ।।३७।।**
**सषड्रसं षड्विधान्नं नैवेद्यं गव्यसंयुतम् । कल्पितं हैमपात्रे ते भुंक्ष्व दत्तांब्वदः पिब ।।३८।।**

(हे) दत्त, भूति+मृत्स्ना+सुकस्तूरी+केशर+अन्वित+चन्दनं रत्न+अक्षताः (च) त्वां कल्पिताः। अथ तैः अलङ्कुर्वे।३४। (हे) दत्त, मनसा कल्पितैः सत्+शमी+बिल्व+तुलसी+पत्रैः, नानाविधैः सौगन्धिकैः सुमैः अर्चयामि।३५। (हे) दत्त! हृदा लाक्षा+सिताभ्र+श्रीवास+श्रीखंड+अगरु+गुग्गुलैः धूपः अग्निना योजितः। तं स्वीकुरु।३६। (हे) स्वप्रकाशक दत्त, हृदा स्वर्ण+पात्रे गो+घृत+आक्त+वर्ति+प्रज्वालितं सकर्पूरं दीपं गृहाण।३७। स+षड्+रसं गव्य+संयुतं षट्+विध+अन्नं हैमपात्रे ते नैवेद्यं कल्पितम्। (हे) दत्त, भुङ्क्ष्व, अदः अम्बु पिब।३८।

**(गंधाक्षता)** हे दत्ता, भस्म, मृत्तिका, कस्तूरी, केशर यांचे बनविलेले चंदन आणि ह्या रत्नाच्या अक्षतांनी आपण अलंकृत व्हा.३४. **(पुष्प)** दत्तराज, मनानेच कल्पिलेल्या उत्तम शमी, बिल्व आणि तुलसी यांच्या पानांनी आणि नानाविध सुगंधित पुष्पांनी मी आपली पूजा करीत आहे.३५. **(धूप)** लाख, अभ्रक, श्रीवास (वृकधूप), चंदन, अगरु आणि गुग्गुळ यांच्यापासून हा मनाने केलेला धूप मी जाळीत आहे. त्याचा स्वीकार करा.३६. **(दीप)** हे स्वयंप्रकाश प्रभो, गाईच्या तुपांत भिजवलेल्या वातींनी मनानेच उजळलेला हा दीप आणि कापूर यांचा स्वीकार करा.३७. **(नैवेद्य)** भक्ष्य (घागरे, अनारसे इत्यादि), भोज्य (पायस, खीर वगैरे), लेह्य (गूळ, मध, श्रीखंड इत्यादि), चोष्य (ऊंसाच्या कांड्यासारखे), पेय (पन्हे, सार इ.) आणि चर्व्य (पापड, कुरुड्या, सांडगे इ.) असे सहा प्रकारचे, तसेच मधुर, खारट, तिखट, कडू, आंबट आणि तुरट अशा सहा रसांनी युक्त असलेले हे अन्न मी सोन्याचा ताटांत मनानेच वाढले आहे ते भक्षण करा.३८.

**प्रक्षाल्यास्यं करौ चाद्भिर्दत्ताचम्य प्रगृह्यताम् । तांबूलं दक्षिणां हैमीं कल्पितानि फलानि च ।।३९।।**
**नीराज्य रत्नदीपैस्त्वां प्रणम्य मनसा च ते । परितस्त्वत्कथोद्घातैः कुर्वे दत्त प्रदक्षिणाः ।।४०।।**
**मन्त्रवन्निहितो मूर्ध्नि दत्त ते कुसुमाञ्जलिः । कल्प्यन्ते मनसा गीत-वाद्यनृत्योपचारकाः ।।४१।।**
**प्रेर्यमाणप्रेरकेण त्वया दत्तेरितेन ते । कृतेयं मनसा पूजा श्रीमंस्तुष्टो भवानया ।।४२।।**
**दत्त मानसतल्पे मे सुखनिद्रां रहः कुरु । रम्ये व्यायतभक्त्यामतूलिकाढ्ये सुवीजिते ।।४३।।**

(हे) दत्त, आस्यं करौ च प्रक्षाल्य, आचम्य । कल्पितानि ताम्बूलं, हैमीं दक्षिणां, फलानि च प्रगृह्यताम्।३९। (हे) दत्त, त्वां मनसा रत्न+दीपैः नीराज्य, ते प्रणम्य च, त्वत् परितः त्वत्+कथा+उद्घातैः प्रदक्षिणाः कुर्वे।४०। (हे) दत्त, ते मूर्ध्नि मन्त्रवत् कुसुम+अञ्जलिः निहितः। गीत+वाद्य+नृत्य+उपचारकाः मनसा कल्प्यन्ते।४१। (हे) दत्त, मे रम्ये व्यायत+भक्ति+आम+तूलिका+आढ्ये मानस+तल्पे रहः सुख+निद्रां कुरु।४२। (हे) दत्त, प्रेर्यमाण+प्रेरकेण त्वया ईरितेन इयं पूजा मनसा कृता। (हे) श्रीमन्, अनया तुष्टः भव।४३।

**(फल-तांबूल-दक्षिणा)** भोजनोत्तर हात धुवून हे पुन्हा आचमन घ्या आणि मनाचेच विडा, सोन्याची दक्षिणा आणि फळ स्वीकारा. ३९. **(आरती-प्रदक्षिणा)** हे दत्ता, (मनाच्याच) रत्नदीपांनी तुला नीरांजन करून नमस्कार करतो आणि तुझ्या कथांचे गान करीत तुझ्याभोवती प्रदक्षिणा करतो.४०. **(मंत्रपुष्प-राजोपचार)** मंत्रघोषासहित ही पुष्पांजली आपल्या मस्तकावर वाहून गीत, वाद्य, नृत्य हे उपचारही मनानेच कल्पिले आहेत.४१. **(समर्पण)** आम्हां सर्वांना स्फूर्ती देणाऱ्या श्रीमंत दत्ता, सर्वांतर्यामि अशा तुझ्याच प्रेरणेने ही मानसपूजा केली. तिने तू प्रसन्न हो.४२. **(विसर्जन)** हे दत्तसखया, माझ्या मनोरूपी पलंगावर घातलेल्या विशाल भक्तिरूप कोमल गादीवर आपण सुखाने पहुडा. हा प्राणवायू आपल्याला विंझण करीत आहे.४३.

## क्षमापराधन

**रसज्ञावशा तारकं स्वादु लभ्यं गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४४।।**
**वियोन्यन्तरे दैवदार्ढ्याद्विभो प्राग्, गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४५।।**
**मया मातृगर्भस्थितिप्राप्तकष्टाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४६।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, रसज्ञा वशा, तारकं स्वादु लभ्यं ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४४। (हे) विभो वियोनि+अन्तरे दैव+दार्ढ्यात् प्राक् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४५। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया मातृ+गर्भ+स्थिति+प्राप्त+कष्टात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४६।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, माझी जिह्वा स्वाधीन असूनही, मी आपले सहजसुलभ, तारक आणि गोड नाम कधीच घेतले नाही. ह्या माझ्या कायिक, वाचिक आणि मानसिक अपराधांची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४४.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, पूर्वजन्मीं मानवेतर योनीत असतांना दुर्दैवाने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४५.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी मातेच्या कुशीत गर्भयातना भोगीत असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४६.

**मया जातमात्रेण संमोहितेन गृहीतं  कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४७।।**
**मया क्रीडनासक्तचित्तेन बाल्ये गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४८।।**
**मया यौवनेऽज्ञानतो भोगतोषाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४९।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया जातमात्रेण संमोहितेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४७। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया बाल्ये क्रीडन+आसक्तेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४८। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया यौवने अज्ञानतः भोग+तोषात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४९।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, नवजात अवस्थेत कशाचीच शुद्ध नसल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४७.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, बालपणी खेळांतच निमग्न असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४८.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, तारुण्यावस्थेत अज्ञानवश भोगासुखांतच रमून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४९.

**मया स्थाविरेऽनिघ्नसर्वेन्द्रियेण गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५०।।**
**हृषीकेश मे वाङ्मनःकायजातं हरेऽज्ञानतो ज्ञानतो विश्वसाक्षिन् ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५१।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया स्थाविरे अनिघ्न+सर्व+इन्द्रियेण ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५०। (हे) हृषीकेश, हरे, विश्व+साक्षिन्, क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मे ज्ञानतः अज्ञानतः (कायिक) अपराधं क्षमस्व, (वाचिक) अपराधं क्षमस्व, (मानसिक) अपराधं क्षमस्व।५१।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, म्हातारपणी माझा सर्व इंद्रियांवरचा ताबा सुटून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५०.

हे इंद्रियांच्या स्वामिन्, क्लेश हरण करणाऱ्या विश्वसाक्षी आर्द्रहृदय दत्ता, मी जाणता वा अजाणता काया, वाचा आणि मनाने केलेल्या अपराधांची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५१.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी ना तुझे कधी स्मरण केले, न ध्यान, न आवाहन, न पूजा! ना कधी तुझी स्तुति केली, ना गुणगान!! मी कधी तुला नमस्कारही केला नाही!!! ह्या माझ्या त्रिविध अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५२.

**स्मृतो ध्यात आवाहितोऽस्यर्चितो वा न गीतः स्तुतो वन्दितो वा न जप्तः ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५२।।**
**दयाब्धिर्भवादृङ् न सागाश्च मादृग् भवत्याप्तमन्तोर्भवान्मे शरण्यः ।।**
**यथालम्बनं भूर्हि भूनिस्सृतांघ्रे-रिति प्रार्थितं दत्तशिष्येण सारम् ।।५३।।**

(हे) क्लिन्न+चित्त प्रभो, (त्वं) मया न स्मृतः, न ध्यातः, न अर्चितः, वा न गीतः, न स्तुतः, न वन्दितः वा न जप्तः असि। (अतः तं) अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५२। भवादृक् दया+अब्धिः, मादृक् स+अगाः च न। भवति आप्त+मन्तोः मे भवान् (एव) शरण्यः, यथा भू+निःसृत+अङ्घ्रेः भूः हि आलम्बनं (अस्ति)। इति दत्त+शिष्येण सारं प्रार्थितम्।५३।

आपल्यासारखा दयासागर कोणी नाही आणि माझ्यासारखा पापी कोणी नाही! जमिनीवरून घसरून पडलेल्याला जमिनीचाच आधार असावा तसे आपलाच अपराधी असलेल्या माझा आश्रय आपणच आहांत! दत्तशिष्याने हा अभिप्राय प्रार्थनेने सादर केला.५३.

# अष्टोत्तरशतनाम.

(इथे भगवान दत्तात्रेयांची एकशे आठ अर्थगर्भ नांवे 'द'च्या बाराखडीच्या आद्याक्षरांनी गुंफली आहेत.)

**दत्तं वन्दे दशातीतं दयाब्धिं दहनं दमम् । दक्षं दरघ्नं दस्युघ्नं दर्शं दर्पहरं दवम् ।।५४।।**
**दातारं दारुणं दांतं दास्यादं दानतोषणम् । दानं दावप्रियं दावं दासत्रं दारवर्जितम् ।।५५।।**
**दिक्पं दिवसपं दिक्स्थं दिव्ययोगं दिगम्बरम् । दिव्यं दिष्टं दिनं दिश्यं दिव्याङ्गं दितिजार्चितम् ।।५६।।**

दश+अतीतं, दया+अब्धिं, दहनं, दमं, दक्षं, दरघ्नं, दस्यु+घ्नं दर्शं, दर्प+हरं दवं दत्तं वन्दे।५४। दातारं, दारुणं, दान्तं, दास्यादं, दान+तोषणं, दानं, दाव+प्रियं दावं, दास+त्रं दार+वर्जितं (वन्दे)।५५। दिक्+पं, दिवसपं, दिक्+स्थं, दिव्य+योगं, दिक्+अम्बरं, दिव्यं, दिष्टं, दिनं, दिव्य+अङ्गं, दिति+ज+अर्चितम् वेन्दे।५६।

दशेंद्रियांच्या अतीत, दयेचे सागर, अग्निस्वरूप, दुष्टांचे (कामादि षड्रिपूंचे) दमन करणारा, भक्तरक्षणांत दक्ष, भयहारक, (भक्तांची हत्या करणाऱ्या) चोरांना मारणारा, (पितरांच्या तृप्तीसाठी) दर्शरूप (अमावास्येचे श्राद्ध), गर्वाचा नाश करणारा, *'वन्याय च'* या श्रुतीनुसार वनस्वरूप अशा दत्ताला वंदन असो.५४. स्वतःचेही दान करणारा दानी, पापी लोकांना यमरूपाने भयावह, जितेंद्रिय, आपल्या भक्तांना विषयाच्या गुलामगिरीतून सोडविणारा, सत्पात्री दानाने संतुष्ट होणारा, सात्त्विक दानस्वरूप, वनविहारी, दावाग्निरूप, सेवकांचा पालक, पत्नीचे ग्रहण न करणारा संन्यासी (अशा दत्ताला वंदन असो.)५५. दिक्पालरूप, सूर्यस्वरूप, दिग्गजरूप, ईश्वरी योगाने युक्त, दिगंबर, देवरूप, कालात्मक, दिनरूप, दिशांमधून प्रकट होणारा, दिव्य शरीर धारण करणारा, प्रह्लादादि दैत्यांनी संपूजित (अशा दत्ताला वंदन असो.)५६.

**दीनपं दीधितिं दीप्तं दीर्घं दीपं च दीप्तगम् । दीनसेव्यं दीनबन्धुं दीक्षादं दीक्षितोत्तमम् ।।५७।।**
**दुर्ज्ञेयं दुर्ग्रहं दुर्गं दुर्गेशं दुःखभंजनम् । दुष्टघ्नं दुग्धपं दुःखं दुर्वासोऽग्र्यं दुरासदम् ।।५८।।**
**दूतं दूतप्रियं दूष्यं दूष्यत्रं दूरदर्शिपम् । दूरं दूरतमं दूर्वाभं दूराङ्गं च दूरगम् ।।५९।।**
**देवार्च्यं देवपं देवं देयज्ञं देवतोत्तमम् । देहज्ञं देहिनं देशं देशिकं देहिजीवनम् ।।६०।।**

दीन+पं, दीधितिं, दीप्तं, दीर्घं, दीपं च दीप्त+गुं, दीन+सेव्यं, दीन+बन्धुं, दीक्षा+दं, दीक्षित+उत्तमं (वन्दे)।५७। दुः+ज्ञेयं, दुः+ग्रहं, दुः+गं, दुर्गा+ईशं, (दुर्ग+ईशं), दुःख+भञ्जनं, दुष्ट+घ्नं दुर्वासः+अग्र्यं, दुः+आसदं (वन्दे)।५८। दूतं, दूत+प्रियं, दूष्यं, दूष्य+त्रं, दूर+दर्शि+पं, दूरं, दूरतमं, दूर्वा+आभं, दूर+अङ्गं च दूर+गं (वन्दे)।५९। देव+अर्च्यं, देव+पं, देवं, देय+ज्ञं, देवता+उत्तमं, देह+ज्ञं, देहिनं, देशिकं, देहि+जीवनं (वन्दे)।६०।

दीननाथ, किरणरूप, तेजस्वी, देदीप्यमान दृष्टीचा, दीनांना सेव्य, दीनबंधू, दीक्षादाता, दीक्षितांमध्ये श्रेष्ठ (अशा दत्ताला वंदन असो).५७. *'गुहाहितं गह्वरिष्ठं'* या श्रुतीनुसार जाणण्यास कठीण, (मन, वाचा आणि इंद्रियें यांना) अप्राप्य, उमापति शिवस्वरूप किंवा मानवी शरीररूप दुर्गाचे रक्षण करणारा, दुःखभंजक, दुष्टसंहारक, (वांझ महिषी दुभती करून तिचे) दूध पिणारा, (स्वकर्मार्जित) दुःखस्वरूप, दुर्वासमुनींचा ज्येष्ठ भ्राता आणि दुष्प्राप्य (अशा दत्ताला वंदन असो).५८. (अग्निरूपाने देवांचा) दूत, (हनुमान, उद्धव आदि आपल्या) दूतांना प्रिय असणारा, वाळवंटांत राहुटीसारखा आश्रयभूत, पतितपावन, दूरदर्शी विद्वानांचा ईश्वर, इंद्रियांपासून दूर असलेला, बहिर्मुख जीवांना कोटिकल्पांतही अलभ्य, दूर्वांकुराप्रमाणे तेजस्वी, त्रैलोक्यव्यापी अशा विशाल देहाचा आणि दोन पायांत ब्रह्मांड ओलांडणारा (अशा दत्ताला वंदन असो).५९. देवांना पूज्य, देवांचा पालक, देवांचा देव, सर्वश्रेष्ठ दैवत, देहरूपी क्षेत्राचा ज्ञाता (क्षेत्रज्ञ), स्वमायेने लीलादेह धारण करणारा, शास्त्राज्ञास्वरूप, मार्गदर्शक गुरू, देहधाऱ्यांना जीवनस्वरूप (अशा दत्ताला वंदन असो).६०.

**दैन्यं दैन्यहरं दैवं दैन्यदं दैविकांतकम् । दैत्यघ्नं दैवतं दैर्घ्यं दैवज्ञं दैहिकार्तिदम् ।।६१।।**
**दोषघ्नं दोषदं दोषं दोषित्रं दोर्द्वयान्वितम् । दोषज्ञं दोहपं दोषेड्बन्धुं दोर्ज्ञं च दोहदम् ।।६२।।**
**दौरात्म्यघ्नं दौर्मनस्य-हरं दौर्भाग्यमोचनम् । दौष्ट्यत्रं दौष्कुल्यदोष-हरं दौर्हृद्यभञ्जनम् ।।६३।।**

दैन्यं, दैन्य+हरं, दैवं, दैन्य+दं, दैविक+अन्तकं, दैत्य+घ्नं, दैवतं, दैर्घ्यं, दैव+ज्ञं, दैहिक+आर्तिदं (वन्दे)।६१। दोष+घ्नं, दोष+दं, दोषं, दोषि+त्रं, दोः+द्वय+अन्वितं, दोष+ज्ञं, दोह+पं, दोषेड्+बन्धुं, दोः+ज्ञं, च दोहदं (वन्दे)।६२। दौरात्म्य+घ्नं, दौर्मनस्य+हरं, दौर्भाग्य+मोचनं, दौष्ट्य+त्रं, दौष्कुल्य+दोष+हरं, दौर्हृद्य+भञ्जनं (वन्दे)।६३।

दुष्कर्मकर्त्यांना दैन्यस्वरूप, भक्तांचे दैन्य हरण करणारा, कृतकर्मांचा फलस्वरूप, भाग्यहीनांना दैन्य देणारा, आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक तापांचे शमन करणारा, विष्णुरूपाने दैत्यांचा संहारक, दैवतस्वरूप, साक्षात महानता, ज्योतिषज्ञ, देहदुःख नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६१. भक्तांचा उद्धार करण्यासाठी त्यांचे चित्तदोष घालविणारा, पापी लोकांची मने दोषांनी युक्त करणारा तसेच त्यांच्या कर्मानुसार कफादि दोषस्वरूप, शरण आलेल्या अपराध्यांचा त्राता, द्विभुज (चतुर्भुज आणि षड्भुजही), सर्व जीवांचे दोष जाणणारा, (वंध्या महिषीचे) दोहन करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीचा पालक, चंद्राचा भाऊ, कोट्यवधी भुजांचा ज्ञाता, (व्रजांतील) गाईंचे दोहन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६२. दुःस्वभाव नाहीसा करणारा, मनाचे विकार दूर करणारा, दुर्भाग्याचे निवारण करणारा, (मनाच्या) दुष्टपणापासून रक्षण करणारा, कुलहीनत्वाचा दोष घालविणारा, हृदयाचे काठिण्य नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६३.

**दण्डज्ञं दण्डिनं दण्डं दम्भघ्नं दम्भिशासनम् । दन्त्यास्यं दन्तुरं दंशि-घ्नं दण्ड्यज्ञं च दण्डदम् ।।६४।।**
**अनन्तानन्तनामानि सन्ति तेऽनन्तविक्रम । वेदोऽपि चकितो यत्र नुर्वाग्हृद्दूर का कथा ।।६५।।**
**नामरूपगुणातीत भेदसङ्गविवर्जित । एक एवाद्वितीयोऽसि परमात्मन् हि नाकवत् ।।६६।।**

दण्ड+ज्ञं, दण्डिनं, दण्डं, दम्भ+घ्नं, दम्भि+शासिनं, दन्त्य+आस्यं, दन्तुरं, दंशि+घ्नं, दण्ड्य+ज्ञं च दण्ड+दं (वन्दे)।६४। (हे) अनन्त, अनन्त+विक्रम, ते अनन्त+नामानि सन्ति। यत्र वेदः अपि चकितः, (हे) वाक्+हृत्+दूर, नुः का कथा?।६५। (हे) नाम+रूप+गुण+अतीत, (हे) भेद+सङ्ग+विवर्जित, परमात्मन्, नाकवत् एक एव अद्वितीयः असि।६६।

दण्डनीतिज्ञ, दण्डधारी संन्यासी, अपराध्यांना दण्डस्वरूप, दंभहारक, दंभी माणसाला शासन करणारा, गजमुख अर्थात् गणेशस्वरूप, करालदंष्ट्र, मधमाशी इत्यादींची पीडा निवारणारा, शासनार्ह अपराध्यांना ओळखणारा तसेच त्यांना शासन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६४. हे अनंता, तुझे अगणित विक्रम असल्याने तुझी नावेही अनंत आहेत. वाणी आणि मनाला अगोचर असणाऱ्या देवा, वेदही जिथे चकित होतात तिथे मानवांची काय कथा?६५. नाम, रूप, गुण या सर्वांच्या पलीकडे असणाऱ्या, स्वगत, सजातीय आणि विजातीय भेद आणि मायासंग यांच्या वेगळा आकाशासारखा एकमेवाद्वितीय असा तू परमात्मा आहेस.६६.

**नामरूपगुणाभेदा मायासक्तिरनेकता । कल्पिता स्थूलधीभिस्ते महाकाशादिवद्विभो ।।६७।।**
**बहुरूपाप्रमेया ते मायैषा जगदीश्वर । मन्यते मेऽहमित्यस्या रममाणो गुणेष्वसौ ।।६८।।**
**कारणं त्विदमेवात्र जगद्विपरिवर्तने । येषां नाव्यक्त गम्योऽसि त्वमेव परमा गतिः ।।६९।।**

(हे) विभो! स्थूल+धीभिः ते नाम+रूप+गुणा भेदा मायासक्तिः अनेकता महा+आकाशवत् कल्पिता।६७। (हे) जगत्+ईश्वर, एषा बहुरूपा अप्रमेया ते माया। अस्या रममाणो असौ, अहं, मे इति मन्यते।६८। इदं एव अत्र जगत्+विपरिवर्तने कारणम्। (हे) अव्यक्त येषां त्वं एव परमा गतिः (इति) न गम्यः असि।६९।

नाम, रूप, गुण, भेद आणि मायेची आसक्ती हे सर्व स्थूलबुद्धीच्या (सगुणनिष्ठ) लोकांनी तुझ्या ठायीं कल्पिलेले आहेत. जसे एका महाकाशाचे ठायी जलाकाश, घटाकाश अशी नावे देऊन त्या त्या उपाधीच्या अनुषंगाने त्या त्या रूपाची, आकाराची कल्पना केली जाते. ही कल्पनाही तात्त्विक नसून अज्ञानमूलक कल्पनेचाच खेळ आहे. त्याचप्रमाणे किंवा ज्ञानी पुरुषांनी शुद्ध स्वरूप जाणण्यासाठी विकल्प किंवा त्याचा अभाव या दोन्हींनी अस्पृष्ट आत्मवस्तूला जाणण्यासाठी चंद्रशाखान्यायाने कल्पिलेल्या आहेत (पंचशील १:५२). हे जगदीश्वर, अंश आणि गुण यांच्या वैविध्याने नानारूपांनी नटलेली ही तुझी माया, कोणत्याही प्रमाणांनी जाणतां येत नाही; तिच्या कार्यावरून तिचे अनुमान करतां आले तरी ही खरी आहे की खोटी असा निश्चय करतां येत नाही. म्हणजेच ती अनिर्वचनीय आहे. ह्या मायेच्या गुणांत देहादिकांच्या अध्यासाने भुलून पुरुष मी आणि माझे ह्या मोहांत पडतो.६७-६८. हेच अहंकार आणि ममता जगाच्या सतत उलाढालीचे कारण आहे. पण हे अव्यक्ता, तूच त्यांची अंतिम गति आहेस हे ते जाणत नाहीत.६९.

**आसत्यलोका लोकास्ते पुनरावर्तिनोऽक्षर । तस्मात्त एव धन्याः स्युर्गृहीतं धाम यैस्तु ते ।।७०।।**
**नानुमानेन ते धाम ग्रहीतुं शक्यते ह्यतः । मृग्योऽसि पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः ।।७१।।**

(हे) अक्षर! ते आसत्यलोकाः लोकाः पुनः+आवर्तिनः। तस्मात् यैः ते धाम गृहीतं ते एव धन्याः स्युः।७०। ते धाम अनुमानेन ग्रहीतुं न शक्यते। अतः पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः असि।७१।

**ब्रह्मलोकाचे दोन प्रकारः-** परमश्रेष्ठ सत्य(ब्रह्म)लोकापर्यंतच्या, सर्वही लोकांपासून (मनुष्यदेहांत) परतावे लागते. (शंका) 'सत्यलोकाला जाणाऱ्या ब्रह्मज्ञाच्या स्वागतासाठी हातांत चामर, माला, अंजन, वस्त्र आणि फळे घेऊन शंभर शंभर अशा पांचशे अप्सरा धांवतात, त्याला ब्रह्मालंकाराने भूषवितात; असा ब्रह्मालंकृत ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप होतो. स्वाराज्य प्राप्त होऊन तो जीव ब्रह्मदेवाबरोबर कल्पांतीं मुक्त होतो' असे श्रुति आणि स्मृतींत वर्णन आहे. ब्रह्मसूत्रांतही (४-२-१०) ह्याची पुष्टी केलेली आहे. काठकश्रुतीतही (२-३-५) ब्रह्मलोकांत ऊनसावलीप्रमाणे ब्रह्मत्वाची स्पष्ट प्रतीति होते असे म्हटले आहे. मग अशा ब्रह्मलोकापासून पुन्हा भूलोकाला यावे लागते असे कसे म्हटले? या शंकेचे समाधान सांगतात. ब्रह्मलोक दोन प्रकारचा आहे. एक क्रममुक्तीच्या साधकांना मिळणारा आणि दुसरा पुण्यकर्माने मिळणारा. यांतील जे पुण्याईच्या बळावर ब्रह्मलोकांत जातात त्यांना त्यांच्या पुण्याचा उपभोग झाल्यावर पुनर्जन्म प्राप्त होतो; कारण त्यांनी ज्ञानाचे साधन केलेले नसते. ज्ञानप्राप्तीचा साधक मात्र ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतो असा अभिप्राय. अशा रीतीने ज्यांनी तुझे रूप आत्मभावाने ग्रहण केले, जे तुझ्याशी एकरूप झाले ते खरोखर धन्य होत.७०. ते तुझे स्वरूप तर्काने जाणतां येत नाही. (कारण अनुमानाने केवळ 'त्वं'पदाचा अर्थ कळूं शकतो.) त्यामुळे बुद्ध्यादिकांच्या साह्याने जागरूक राहणारा मानवच तुझा शोध घेऊं शकतो.७१.

**पुंस्त्वेऽप्यर्क इवान्धानां गोकल्पानामतीन्द्रिय । स्वप्नेऽपि नैव ते वार्ता पुनः प्रत्यक्षता कुतः ।।७२।।**
**प्रेष्ठत्वद्भक्तसंयोग-विवेकामलदृष्टिभिः । साङ्ख्ययोगपरैर्धीरैः क्रमात्ते धाम गम्यते ।।७३।।**
**तस्माद्दत्तं नृजन्मेदं त्वया दिष्ट्याऽमृतक्षमम् । सद्दृष्टिदानाद्भगवंस्तत्साफल्यं कुरु प्रभो ।।७४।।**
**त्वत्प्रेमभक्त्यैव सदा मदात्मा धिया धियं दृष्टिमपीश दृष्ट्या ।**
**अंगैः सदाङ्गानि दृढं दयाब्धे हरे निबध्नात्विति मेस्ति याच्ञा ।।७५।।**

(हे) अति+इन्द्रिय, पुंस्त्वे अपि गो+कल्पानां, अन्धानां अर्क इव, स्वप्ने अपि ते वार्ता न एव। पुनः प्रत्यक्षता कुतः?७२। प्रेष्ठ+त्वत्+भक्त+संयोग+विवेक+अमल+दृष्टिभिः साङ्ख्य+योग+परैः ते धाम क्रमात् गम्यते।७३। (हे) भगवन् इदं अमृत+क्षमं नृ+जन्म त्वया दिष्ट्या दत्तम्। (हे) प्रभो, सत्+दृष्टि+दानात् तत्+साफल्यं कुरु।७४। (हे) हरे, मत्+आत्मा त्वत्+प्रेम+भक्त्या एव, (मे) धियं (त्वत्) धिया, दृष्टिं अपि दृष्ट्या, अङ्गानि अङ्गैः सदा दृढं निबध्ना अस्तु इति याच्+ञा।७५।

हे इंद्रियातीत प्रभो, मानवांतसुद्धां जे पशुतुल्य आहेत त्यांना तुझी स्वप्नांतही वार्ता नसते; मग प्रत्यक्ष अनुभूतीची काय गोष्ट? साकार ब्रह्मनिष्ठाही दुर्लभ आहे मग मोक्षाची काय वार्ता असा भाव. कारण मोक्ष केवळ ज्ञानानेच प्राप्त होतो; त्याला दुसरा मार्गच नाही असे श्रुति (महावाक्योपनिषद् ३; श्वेताश्वतर उ. ३-८) म्हणते.७२. तुझ्या प्रियतम भक्तांचा सत्संग आणि विवेक ह्या दोन निर्मल डोळ्यांच्या साह्याने ज्ञानयोग आणि निष्कामकर्मयोग यांचे अनुष्ठान यमनियमादि साधनांसह करणाऱ्याना श्रवण-मनन-निदिध्यासनादि क्रमाने तुझे स्वरूप प्राप्त होते.७३. त्यासाठी हे भगवंता, दत्तप्रभो, आपण आमच्या भाग्याने हा मोक्षयोग्य मानवजन्म दिलेला आहे त्याचे साफल्य होण्यासाठी (वरीलप्रमाणे) निर्मल नेत्रांचे दान आपण करा.७४. हे हरे, तुझ्या प्रेमभक्तीने माझे मन, तुझ्या बुद्धीने माझी बुद्धी, दृष्टीने दृष्टी तसेच तुझ्या सर्व अंगांनी माझी अंगे सदैव निबद्ध असोत. तुझा आणि माझा परस्परवियोग अंशतःसु--दोर कधीच होऊं नये.७५.

**पादौ त्वदीयालयतीर्थयात्राविहारिणावर्चनतत्परौ मे ।**
**करौ रसज्ञापि भवत्वजस्रं सत्त्वत्कथोद्घातरसज्ञतोत्का ।।७६।।**
**त्वत्पादपद्मच्युतपुष्पगन्धं नासा भजत्वक्षियुगं गुणात्मन् ।**
**त्वन्मूर्तिमासेचनकां श्रुती मे श्राव्यास्त्वदीया भगवन्कथाश्च ।।७७।।**
**त्वदीयभक्ताङ्घ्रिमलाब्जपूतां धूलिं मदङ्गानि सदा वहन्तु ।**
**मनस्तुरङ्गो निवसत्वजस्रं त्वय्येव दीपोऽङ्ग यथा निवाते ।।७८।।**

मे पादौ त्वदीय आलय+तीर्थ+विहारिणौ, मे करौ अर्चन+तत्परौ, रसज्ञा अपि अजस्रं सत्+त्वत्+कथ+उद्घात+रसज्ञता+उत्का भवतु।७६। नासा त्वत्+पाद+पद्म+च्युत+पुष्प+गन्धं भजतु। (हे) गुण+आत्मन्, (मे) अक्षि+युगं आसेचनकां त्वत्+मूर्तिं भजतु।७७। (हे) भगवन्, मे श्रुतीः च त्वदीया श्राव्या कथाः (भजन्तुर)। मत्+अङ्गानि सदा त्वदीय+भक्त+अङ्घ्रि+अमल+अब्ज+पूतां धूलिं वहन्तु। तुरङ्गः मनः, यथा निवाते दीपः, अजस्रं त्वयि एव निवसतु।७८।

ह्या माझ्या शरीराचा विनियोग सर्वतोपरी तुझ्या सेवेतच व्हावा यासाठी प्रार्थना करतात. माझे मन तुझ्याच प्रेमभक्तीशी, बुद्धी तुझ्या बुद्धीशी, दृष्टी दृष्टीशी, सर्व अंगे तुझ्या अंगांशी सतत घट्ट जडलेले राहोत.७५. माझे पाय तुझ्याच मंदिरांच्या व तीर्थांच्या यात्रांत विचरण करोत. माझे हात तुझ्या पूजनांत तत्पर होवोत. माझी जिह्वा तुझ्या सत्कथांच्या गीतांचा स्वाद जाणून त्यांच्या उद्घोषासाठी सदैव आतुर असो.७६. माझे नाक तुझ्या पायांवरून पडलेल्या फुलांचा गंध सेवन करो. जिला पाहून मन कधी भरतच नाही अशी तुझी मनोहर मूर्ति सतत माझ्या दृष्टीसमोर राहो.७७. तुझ्या भक्तांच्या पदकमलांनी पवित्र झालेल्या धुळीने माझे शरीर सदैव माखलेले असो. सतत धांवणारा हा मनरूपी घोडा तुझ्या ठायी निवातींच्या दीपाप्रमाणे स्थिर राहो. वाऱ्याची झुळकही जेथे येत नाही अशा ठिकाणी दिव्याची ज्योत जशी निश्चळ राहते तसे संकल्पापासून निपजणाऱ्या सर्व कामांचा त्याग करून, अभ्यास आणि वैराग्य यांच्या बळाने हळू हळू उपरमलेले माझे चित्त तुझ्या ठायी स्थिर होवो. म्हणजेच धर्ममेघ नांवाच्या निर्बीज समाधीची सिद्धि होवो ही प्रार्थना.७८.

**शिरो नमत्वीश्वर तेऽङ्घ्रिपद्मं देहः सदाऽऽलिङ्गयतु त्वदर्चाम् ।**
**एषा त्वदीयैव तनुस्त्वमेव संबन्धिनो मे नहि केऽद्वितीय ॥७९॥**
**नूनं भवानृषिर्नैव न वर्णाश्रमलिङ्गभाक् । निर्मितं भवतैवेदं विश्वं स्वांशांशतोऽखिलम् ॥८०॥**
**न जानन्ति भवन्माया-मोहिता दिव्यमुत्तमम् । भवद्धामात एवैते भ्रमन्त्यसुरभावगाः ॥८१॥**

(हे) ईश्वर, शिरः ते अङ्घ्रि+पद्मं नमतु। देहः सदा त्वत्+अर्चां आलिङ्गयतु। एषा तनुः त्वदीय एव। (हे) अद्वितीय, त्वं एव मे सम्बन्धिनः, न हि के (अपि त्वत्तः अन्याः)।७९। भवान् ऋषिः न एव, न वर्ण+आश्रम+लिङ्ग+भाक्। भवता एव इदं अखिलं विश्वं स्व+अंशतः निर्मितम्।८०। भवत्+माया+मोहिताः दिव्यं उत्तमं भवत्+धाम न जानन्ति। अत एव ते असुर+भाव+गाः भ्रमन्ति।८१।

ईश्वरा, माझे मस्तक तुझ्याच चरणीं नत असो, माझा देह सतत तुझ्या मूर्तीच्या आलिंगनांत राहो. ही माझी तनु तुझीच आहे. अद्वितीया, तुझ्यावांचून कोणीही माझे नाही.७९. आपण म्हणाल की माझी एका ऋषिपुत्राची का एवढी आळवणी करतोस?' तर खरोखर आपण ऋषिपुत्र नाहीत. तसेच आपल्याला वर्ण, आश्रम, लिंग आदींचा कांही संबंध नाही. वर्णाश्रमादि देहाच्या ठिकाणी मायेने कल्पिलेले आहेत. आपण आत्मस्वरूप आहां. *'असंगो न हि सज्जते'* (बृहदारण्यक उपनिषद् ४-५-१५) ह्या श्रुतीनुसार त्याचा देहादि उपाधीशी कांही संबंध नाही. कूटस्थ प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार झालेलाही वर्णाश्रमलिंगाच्या पलीकडे जातो. आपण तर लीलेने देह धरला आहे. मग आपण वर्णाश्रमादींच्या अतीत आहे हे काय सांगायला हवे? आपणच ह्या नामरूपात्मक विश्वाचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहां आणि ब्रह्मदेवांच्या करवी आपणच हे जगत् रचले आहे.८०. आपल्या मायेने मोहून जाऊन असुरभावापन्न झालेले आपले उत्तम आणि दिव्य स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळेच ते संसारचक्रांत भ्रमण करतात.८१.

**कर्ता भर्तासि हर्ता त्वं प्रत्यक्षं तत्त्वमस्यपि । भो सर्वं खल्विदं ब्रह्म त्वमस्यात्मासि केवलम् ।।८२।।**

**त्वदुदेति रमत्येतद्विश्वं त्वय्येव लीयते । अष्टमूर्तिभिराभिस्त्वमाभासीव जगन्मयः ।।८३।।**

**दिक्पाला लोकपालाश्च श्रूयते दृश्यतेऽखिलम् । चराचरं जगल्लोका विष्णो तेऽवयवा अमी ।।८४।।**

**निगूढतत्त्व ते ज्ञातं यत्किञ्चिल्लोकदुर्ग्रहम् । चेष्टितं ते प्रसादोऽयं प्राक्पुण्यैर्मय्युपस्थितः ।।८५।।**

त्वं कर्ता, भर्ता, हर्ता, प्रत्यक्षं तत्त्वं अपि असि। भो त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म, केवलं आत्मा असि।८२। एतत् विश्वं त्वत् उदेति, रमति, त्वयि एव लीयते। त्वं अष्ट+मूर्तिभिः जगत्+मयः इव आभासि। (हे) विष्णो, दिक्+पालाः लोक+पालाः च अखिलं चर+अचरं जगत् (यत्) श्रूयते, दृश्यते, अमी ते अवयवयाः।८४। (हे) निगूढ+तत्त्व, ते लोक+दुः+ग्रहं चेष्टितं यत् किञ्चित् ज्ञातं अयं ते प्रसादः मयि प्राक्+पुण्यैः उपस्थितः।८५।

सगुणरूपाने तूच या सृष्टीचा कर्ता, पोशिंदा आणि संहर्ता आहेस. तूच प्रत्यक्ष तत्त्वस्वरूप आहेस. हे सर्व जग तूच आहेस; तुझ्याच अधिष्ठानावर ते भासत आहे. तूच परब्रह्म आहेस. हा श्लोक मंत्रगर्भ आहे.८२. *'यतो वा इमानि भूतानि...'* ह्या श्रुतिवचनानुसार (तैत्तिरीय उपनिषद् ३-१) हे सर्व जगत् तुझ्यापासून उदय पावते, तुझ्यांतच रमते आणि तुझ्यांतच विलीन होते. पृथ्वी, आप, अग्नि, सूर्य, चंद्र, वायु, आकाश आणि जीवात्मा ह्या अष्टमूर्तींच्या रूपाने भासणारा विश्वात्मक तूच आहेस (*'इव'* शब्दाने ते तत्त्वतः तसे नाही हे सूचित केले आहे.).८३. इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मदेवादि लोकपाल, सर्व चराचर जगत्, हे अनुभवाला येणारे जगत्, वेदांनी वर्णिलेले स्वर्गादि सप्तलोक, सप्तपाताल हे सर्व, हे विष्णो, तुझेच अवयव आहेत. कारण तूच विराट स्वरूपाने हे सर्व धारण करतोस.८४. हे निगूढतत्त्व (अविज्ञेयस्वरूप), लोकांना दुर्बोध असणाऱ्या तुझ्या लीला किंचित् मात्र मला समजल्या हा तुझाच प्रसाद होय.८५.

**सुखमैन्द्रियकं क्वापि न कांक्षे ते पदाश्रितः । नाकादीन्न प्रशंसामि नैव निन्दामि नारकान् ।।८६।।**
**यथेच्छं क्वापि मां कर्म-योगात्स्थापय विश्वभृत् । मां यत्र क्वापि ते भक्तिर्न जहात्विति काङ्क्षितम ।।८७।।**
**स्तुवन्तु निन्दत्वपि ताडयन्तु मां पूजयन्त्वत्र जना न वापि ।**
**देहः पतत्वद्य युगान्तरे वा न किञ्चिदिष्टं न च मेऽप्यनिष्टम् ।।८८।।**
**हृद्ध्यात्मेन्द्रियवाक्कायैः सदा प्रकृतिभावतः । यद्यत्करोम्यर्पयामि परात्मन्दत्त सर्व ते ।।८९।।**

ते पद+आश्रितः क्व अपि ऐन्द्रियकं सुखं न काङ्क्षे। नाकादीन् न प्रशंसामि, न एव नारकान् निन्दयामि।८६। (हे) विश्वभृत्, मां कर्म+योगात् यथा+इच्छं क्व अपि स्थापय, यत्र क्व अपि ते भक्तिः न जहातु इति काङ्क्षितम्।८७। जनाः मां स्तुवन्तु, निन्दन्तु, अपि वा ताडयन्तु, न वा पूजयन्तु; देहः अद्य, युग+अन्तरे वा पततु; मे न किञ्चित् इष्टं न च अपि अनिष्टम्।८८। (हे) पर+आत्मन् दत्त, हृत्+धी+आत्म+इन्द्रिय+वाक्+कायैः सदा प्रकृति+भावतः यत् यत् करोमि, सर्वं ते अर्पयामि।८९।

आपल्या पदांचा आश्रय लाभल्यावर आतां मी कसल्याही ऐंद्रिय (भौतिक) सुखाची इच्छा करीत नाही. मी न स्वर्गादिकांना नावाजतो न नरकांची निंदा करतो.८६. हे जगाच्या पोषका, कर्मयोगानुसार (माझ्या कर्मगतीनुसार) मला जिथे कुठे ठेवायचे ते ठेव. तुझ्या भक्तीला मात्र मी कधी पारखा होऊ नये हीच माझी प्रार्थना आहे.८७. लोक माझी स्तुति करोत की निंदा; माझी पूजा करोत की मला चोप देवोत; हा देह आजच पडो वा युगानंतर! मला कांही इष्ट नाही की अनिष्ट नाही.८८. हे दत्त परमात्मन्, मनाने, बुद्धीने, शरीराने वा स्वाभाविक प्रकृतीने मी जे जे करतो ते सर्व तुला अर्पण असो. मन, बुद्धी, अहंकार, दहा इंद्रिये, वाचा (विशिष्ट वाचिक कर्माच्या निर्देशासाठी वेगळा उल्लेख) आणि काया तसेच स्वभावतः जी लौकिकादि कर्मे मी करतो ती सर्व हे दत्ता, तुला समर्पण करतो.८९.

**लीलात्मना योऽत्रिगृहेवतीर्णो दत्ताख्य उन्मत्तपिशाचवद्यः ।**
**बालो युवा क्वापि जरन्जटाभृत् क्वचिदृषिर्व्यक्तपरीक्षितश्च ।।९०।।**
**त्यागी सुभोगी क्वचिदस्ति संगी योगी सुवासाः क्वचिदस्ति नग्नः ।**
**तुष्टः कृशः पुष्ट इह क्वचिद्यो दंडी च भिक्षुः क्वचिदस्ति वर्णी ।।९१।।**
**गृही वनी वर्णविरुद्धचेष्टः क्वचिच्च वर्णाश्रमधर्मयुक्तः ।**
**इत्यादयो यस्य विचित्रचेष्टा देवर्षिहृद्वागयनं व्यतीताः ।।९२।।**

यः दत्त+आख्यः लीला+आत्मनः अत्रि+गृहे अवतीर्णः, यः उन्मत्त+पिशाचवत्, बालः, युवा, क्व अपि जटा+भृत् जरन्, क्वचित् व्यक्त+परीक्षितः ऋषिः, त्यागी, सुभोगी, क्वचित् संगी अस्ति, (क्वचित्) सुवासाः क्वचित् नग्नः अस्ति; यः इह क्वचित् तुष्टः, कृशः, पुष्टः; क्वचित् दंडी भिक्षुः (क्वचित्) वर्णी अस्ति।९१। क्वचित् गृही, (क्वचित्) वर्णी, वर्ण+विरुद्ध+चेष्टः क्वचित् च वर्ण+आश्रम+धर्म+युक्तः। यस्य इत्यादयः विचित्र+चेष्टाः देव+ऋषि+हृत्+वाक्+अयनं व्यतीताः।९२।

जो अत्रींच्या घरांत लीलादेह धारण करून अवतरला; (जो) भक्तांची परीक्षा पाहण्यासाठी (ज्ञान व ऐश्वर्य यांनी संपन्न असूनही) बाल, उन्मत्त आणि पिशाचवत् वर्तन करतो; कधी बाल, कधी युवा, कधी जटाधारी वृद्ध तर कधी लोकांनी प्रकट पाहिलेला ऋषि; कधी योगी, कधी उत्तम वेषांत तर कधी नग्न; कधी तुष्ट, कधी पुष्ट तर कधी कृश; कधी दंडधारी संन्यासी, कधी भिक्षु (दंडरहित परमहंस), कधी ब्रह्मचारी, कधी गृहस्थ, कधी वानप्रस्थ, कधी वर्णाश्रमांच्या विरुद्ध वागणारा तर कधी परत वर्णाश्रमांना धारण करणारा; इत्यादि ज्याच्या अनेक प्रकारच्या अदभुत लीला देव आणि ऋषींच्यासुद्धां मन आणि वाचा यांना न आकळणाऱ्या आहेत (मानवांचा काय पाड?).९०-९२.

**यो भक्तरक्षाक्षण एव यस्य वै सेवा स्मृतिर्भोज्यनिवेदनं धिया ।**
**पूजाफलं योऽर्पयतीह दुर्लभं भक्तस्मृतौ संनिधिकृत्क्षणे क्षणे ।।९३।।**
**यस्यास्ति माहुरे निद्रा निवासः सह्यपर्वते । भागीरथ्यां सदा स्नानं ध्यानं गन्धर्वपत्तने ।।९४।।**
**कुरुक्षेत्रे चाचमनं धूतपापेश्वरे तथा । विभूतिधारणं संध्या करहाटे श्रियः पुरे ।।९५।।**
**भिक्षा विठ्ठलपुर्यस्य सुगन्धिद्रव्यधारणम् । भुक्तिः सारपुरे सायं-संध्या पश्चिमसागरे ।।९६।।**

यः भक्त+रक्ष+क्षणः, यस्य वै स्मृतिः एव सेवा, धिया भोज्य+निवेदनं पूजा, यः इह दुर्लभं फलं अर्पयति, भक्त+स्मृतौ संनिधि क्षणे क्षणे संनिधि+कृत्।९३। यस्य निद्रा माहुरे अस्ति, निवासः सह्य+पर्वते, सदा भागीरथ्यां स्नानं, गन्धर्व+पत्तने ध्यानं, कुरुक्षेत्रे च आचमनं, तथा धूतपापेश्वरे विभूतिधारणं, करहाटे संध्या, श्रियः पुरे भिक्षा, अस्य विठ्ठलपुरि सुगन्धि+द्रव्य+धारणं, सारपुरे भुक्तिः, पश्चिम+सागरे सायं+संध्या (अस्ति)।९४-९६।

आपल्या भक्तांचे रक्षण करणे हाच ज्याचा आनंदोत्सव आहे, केवळ स्मरण हीच ज्याची सेवा आहे, आपले अन्न (स्वतः सेवन करण्याआधी) त्याला भक्तीने समर्पण करणे हीच ज्याची पूजा आहे आणि अशा अर्चकांच्या भक्तीने प्रसन्न होऊन जो तपादिकांनीही दुर्लभ असे फळ देतो. भक्तांनी स्मरतांच त्यांच्या निकट उभा राहणारा (तो दत्त परमात्मा).९३.

**दत्तात्रेयांची दिनचर्या.**

जो माहूरगडावर झोंपतो, सह्यशिखरावर राहतो, गंगाभागीरथींत नित्य स्नान करतो, गाणगापुरीं ध्यान करतो, कुरुक्षेत्रांत आचमन करतो, (हिमालयाच्या पायथ्याशी) धूतपापेश्वरला भस्म धारण करतो, कऱ्हाडला संध्या करतो, कोल्हापुरामध्ये भिक्षा करतो, पंढरपुरामध्ये सुगंधि द्रव्य धारण करतो, पांचालेश्वरीं भोजन करतो आणि पश्चिमसागराच्या तटावर सायंसंध्या करतो.९४-९६.

**स एष भगवान्दत्तः सदा वसतु मे हृदि । हृद्धीन्द्रियादिव्यापारे सदा तत्स्मृतिरस्तु मे ।।९७।।**
**पादादि मूर्धपर्यन्तमेतद्वै भौतिकं वपुः । परिरक्षतु विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः ।।९८।।**
**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यदृग्योपि शृणोत्यकर्णः ।**
**यो वेत्ति वेद्यं न हि यस्य वेत्ता सोऽग्र्यः प्रधानः पुरुषो हि दत्तः ।।९९।।**

सः एषः भगवान् दत्तः सदा मे हृदि वसतु। हृत्+धी+इन्द्रियादि+व्यापारे सदा मे तत् स्मृतिः अस्तु।९७। एतत् पादादि मूर्धपर्यन्तं भौतिकं वपुः विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः वै परिरक्षतु।९८। यः अ+पाणि+पादः ग्रहीता जवनः, अदृक् अपि पश्यति, अकर्णः शृणोति। यः वेद्यं वेत्ति। यस्य वेत्ता न हि। सः अग्र्यः प्रधानः पुरुषः दत्तः हि।९९।

तो हा भगवान् दत्त सदैव माझ्या अंतःकरणांत राहो, माझ्या मन, बुद्धी, इंद्रियें आणि देहाच्या सर्व क्रियांत मला त्याचे स्मरण राहो.९७. **कवच** - पायापासून मस्तकापर्यंत ह्या पांचभौतिक स्थूल आणि सूक्ष्म शरीराचे तो विश्वात्मक भगवंत सदा सर्व दिशांनी संरक्षण करो.९८. ज्याच्या सत्तेने थोटासुद्धां (देतो) घेतो, पांगळाही वेगाने धांवतो, आंधळा पाहतो, बहिरा ऐकतो; जाणण्यायोग्य सर्वांचा जो ज्ञाता आहे, पण त्याचा ज्ञाता कोणीही नाही (श्वेताश्वतर उपनिषद् ३:१९). कारण तो जाणीवेच्या पलीकडे आहे. तोही स्वतःला 'मी असा आहे', असे जाणत नाही. ह्यावर कुणी असे म्हणेल की मग तो सर्वज्ञ नाही तर तसे नाही. सशाचे शिंग माहीत नसल्याने सर्वज्ञत्वाला बाध येत नाही तसेच जाणीवेच्या पलीकडील स्वतःला न जाणल्याने परमात्म्याच्या सर्वज्ञत्वाला बाध येत नाही. तोच दत्त आद्य, श्रेष्ठ व अंतर्यामी पुरुष आहे.९९.

**आधारभूतः स्थिरजङ्गमानां क्षमास्वरूपस्थितिरस्ति नित्यम् ।**
**आप्यायते यो जगदप्स्वरूपी सर्वाघहृत्स्थास्नुचरिष्णु जीवः ।।१००।।**
**वैश्वानरात्माखिलदेहसंस्थः पचत्यसौ प्राणसखः सदान्नं ।**
**यो भास्वदात्माखिलकर्मसाक्षी विश्वं सदा चेतयते स्वभासा ।।१०१।।**

स्थिर+जङ्गमानां आधारभूतः क्षमा+स्वरूप+स्थितिः नित्यं अस्ति। यः सर्व+अघ+हृत् अप्+स्वरूपी जगत् आप्यायते। (यः) स्थास्नु चरिष्णु जीवः।१००। असौ अखिल+देह+संस्थः वैश्वानर+आत्मा प्राण+सखः सदा अन्नं पचति। यः भास्वत्+आत्मा अखिल+कर्म+साक्षी स्वभासा सदा विश्वं चेतयते।१०१।

**दत्तप्रभूचे अष्टमूर्तित्व** (श्लोक ८३ पहा.) सर्व चराचर सृष्टीचा आधार असणाऱ्या **पृथ्वी**च्या रूपाने तो नित्य स्थित आहे. तो **जल**रूपाने सर्व जगाची पुष्टि करतो, सर्व (कायिक, वाचिक, मानसिक) पापांचा नाश करतो तसेच सर्व स्थावर-जंगमांचा तो आत्मा आहे.१००. **जठराग्नी**च्या रूपाने सर्व देहांत (मानवांत त्रिकोणी, पशूंत चतुष्कोणी, पक्ष्यांत वर्तुलाकृति आणि मत्स्यादिकांत लंबवर्तुलाकार) राहून, हा (अपानसहित) प्राणाचा सखा सदैव अन्नाचे पचन करतो. अग्नीच्या वर पाणी आणि त्या पाण्यावर अन्न ठेवून, अग्नीच्या खाली स्वतः प्राण अग्नीला हळूंहळूं चेतवतो. *(ऊर्ध्वमग्नेर्जलं कृत्वाऽन्नं च जलोपरि। अग्नेश्चाधः स्वयं प्राणः स्थित्वाग्निं धमते शनैः।।* गरुडपुराण प्रेतखंड, धर्मकांड, ३२:४८-४९.) ह्या उक्त्यनुसार तसेच *अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः्। प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्।।* (भ.गीता १५:१४) ह्या भगवद्वचनाला अनुसरून **सूर्या**च्या रूपाने आपल्या तेजाने सर्व विश्व सदा प्रकाशणारा, सर्व कर्मांचा साक्षी (हाच दत्तप्रभू आहे).१०१.

**योऽब्जो रसात्मा सकलौषधीर्वै पुष्णाति संतापहरोऽखिलेड्यः ।**
**क्षेत्रेषु भूत्वा दशधाखिलेषु प्राणात्मको यः पवतेऽखिलात्मा ।।१०२।।**
**आकाशरूपोऽखिलगोऽपि सौक्ष्म्याद्योऽभेदसङ्गः किल शब्दसंस्थः ।**
**भुनक्ति चोत्क्रामति तिष्ठतेऽपि मूढा विदुर्यं न सदात्मरूपं ।।१०३।।**

यः रस+आत्मा अब्जः संताप+हरः अखिल+ईड्यः वै सकल+औषधीः पुष्णाति। अखिलेषु क्षेत्रेषु दशधा भूत्वा यः प्राण+आत्मकः अखिलात्मा पवते।१०२। आकाश+रूपः अखिल+गः अपि सौक्ष्म्यात् यः अ+भेद+संगः किल शब्द+संस्थः भुनक्ति, उत्क्रामति च तिष्ठते अपि मूढा यं सत्+आत्म+रूपं न विदुः।१०३।

जो रसात्मक **चंद्र** होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो आणि जीवमात्रांचा दाह आपल्या शीतलतेने शमन करून सर्वांकडून स्तविला जातो. प्राणिमात्रांच्या देहांत दशधा होऊन (प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय) वाहणारा जो सूत्रात्मक **प्राण** आहे (*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्..* बृहदारण्यकोपनिषद् ३.७.२).१०२. जो आकाशरूपाने सर्वव्यापी, सूक्ष्मत्वाने अभेद आणि असंग आहे आणि ज्याच्या आश्रयाने शब्द राहतो. जीवरूपाने स्थित असलेल्या, सुखदुःखांचा भोग घेणाऱ्या आणि मृत्यूसमयीं देह सोडून जाणाऱ्या ज्याला अज्ञानी जाणत नाहीत. (*उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्। विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषा।।* (भ.गीता १५:१०).१०३.

**यः सर्वहृत्स्थोऽस्य यतः स्मृतिर्विद् वेदान्तकृद्योऽपि च वेदवेद्यः ।**
**समौ यदंशौ सयुजौ सुपर्णौ वृक्षाश्रितौ भुक्त्यवलोकनोत्कौ ।।१०४।।**
**स त्वं परात्मा पुरुषोत्तम श्रुति-ख्यातः समाविश्य जगत्त्रयं सदा ।**
**ईशाव्ययानन्त बिभर्षि दत्त ते पादाब्जयुग्माय नमोऽस्तु सर्वदा ।।१०५।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्क-युग्रक्ताब्जाभपत्तलः । गूढगुल्फः कूर्मपृष्ठोल्लसत्पादोपरिस्थलः ।।१०६।।**

यः सर्व+हृत्+स्थः यतः स्मृतिः वित्, यः अपि वेद+अन्त+कृत् च वेद+वेद्यः। वृक्ष+आश्रितौ यत्+अंशौ समौ, सयुजौ, सुपर्णौ भुक्ति+अवलोकन+उत्कौ।१०४। सः त्वं परात्मा पुरुष+उत्तमः श्रुति+ख्यातः (हे) ईश, (हे) अव्यय, (हे) अनन्त, (हे) दत्त जगत्+त्रयं समाविश्य बिभर्षि। ते पाद+अब्ज+युग्माय सर्वदा नमः अस्तु।१०५। वज्र+अङ्कुश+ध्वज+अब्ज+अङ्क+युक् रक्त+अब्ज+आभ+पत्+तलः, गूढ+गुल्फः कूर्म+पृष्ठ+उल्लसत् पाद+उपरि+स्थलः,।१०६।

जो सर्वांतर्यामी आहे, ज्याच्यापासून प्राणिमात्रांना स्मृती (पूर्वी अनुभवलेल्या विषयाचे स्मरण) आणि ज्ञान (विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगाची जाणीव) प्राप्त होतात, जो वेदांताचा कर्ता - ज्ञानदाता गुरू आणि संप्रदायाचा प्रवर्तक आहे आणि सर्व वेद विविध देवतारूपाने ज्याचे वर्णन करतात (किंवा जो उपनिषदांत वर्णन केलेला पुरुष आहे). चेतनत्वाने सम (सारख्या स्वभावाचे), सयुज (परस्पर मित्र), सुपर्ण (विश्वकोशानुसार उत्तम गति किंवा सहाय असलेले), गीतेने असंगशस्त्राने छेदण्यास सांगितलेल्या देहरूपी वृक्षाच्या (छेदनार्थी ओव्रूः धातूपासून वृक्ष) आश्रयाने राहणारे, कर्मफलांचा भोग भोगणारा जीव आणि साक्षित्वाने पाहणारा ईश्वर ज्याचे अंश आहेत.१०४. असा जो तो तूं परमात्मा; अचेतन अशा क्षर अशा पदार्थांचा चेतन आणि अक्षर नियंता असल्याने त्यांहून विलक्षण आणि म्हणूनच *'स वा अयमामात्मा', 'सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्यादिपतिः', 'सर्वमिदं प्रशास्ति'* इत्यादि श्रुत्यनुसार पुरुषोत्तम; वेदांनी प्रतिपादित, अव्यय आणि अनंत ईश्वर, त्रैलोक्य व्यापून त्याचे पालन करतोस. तुझ्या पदद्वयांना सतत वंदन असो.१०५.

**जानुपूर्वकजङ्घश्च विशालजघनस्थलः । पृथुश्रोणिश्च काकुत्स्थश्चारुनाभिर्दलोदरः ।।१०७।।**
**अररोरा मांसलांसो युगव्यायतबाहुकः । सुचिह्नचिह्नितकरः कम्बुकण्ठः स्मिताननः ।।१०८।।**
**स्नैग्ध्यधावल्ययुक्ताक्षश्चलत्-पिङ्गजटाधरः । चन्द्रकान्तिः प्रभुः कृष्ण-भ्रूरःश्मश्रुकनीनिकः ।।१०९।।**
**भावशुद्धद्विजाकीर्ण-स्वास्याब्जोऽभीवरप्रदः । दत्तात्रेयः स भगवान्सदा वसतु मे हृदि ।।११०।।**

जानु+पूर्व+जङ्घः च, विशाल+जघन+स्थलः, पृथु+श्रोणिः, च काकु+त्स्थः, चारु+नाभिः, दल+उदरः,।१०७। अरर+उरः मांसल+अंसः, युग+व्यायत+बाहुकः, सु+चिह्न+चिह्नित+करः, कम्बु+कण्ठः, स्मित+आननः,।१०८। स्नैग्ध्य+धावल्य+युक्त+अक्षः, चलत्+पिङ्ग+जटा+धरः, चन्द्र+कान्तिः, कृष्ण+भ्रू+उर+ श्मश्रु+कनीनिकः।१०९। भाव+शुद्ध+द्विज+आकीर्ण+सु+आस्य+अब्जः, अभी+वर+प्रदः, सः भगवान् दत्तात्रेयः प्रभुः सदा मे हृदि वसतु।११०।

**ध्यान -** (हे पायापासून आरंभ करून मुखापर्यंत केले आहे. प्रत्यक्ष पाहून केलेले हे वर्णन आहे. हे ध्यान दिगंबर असून ह्यांत कोणत्याही वस्त्र, आयुध किंवा आभरणांचा उल्लेख नाही. हे ध्यान द्विभुज आहे.) वज्र, अंकुश, ध्वजा आणि कमल या चिह्नांनी युक्त, लाल कमळाच्या रंगाचे तळवे असलेले, कांसवाच्या पाठीसारखे फुगीर वरचा भाग असलेले आणि टांचा झांकलेले ज्याचे पाय आहेत, मांडीच्या वरच्या भागावर एक पाय गंमतीने ठेवलेला आहे; प्रशस्त बैठक असलेला, दिगंबर, सुंदर नाभीसह पातळ पोट असलेला, कपाटासारखी रुंद छाती असलेला, मांसल बाहूंचा, विशाल बाहुद्वयांनी युक्त, ज्याचे हात शुभचिह्नांनी मंडित आहेत, ज्याचा गळा शंखासारखा तीन वलयांनी युक्त आहे, चेहऱ्यावर मधुर स्मित विलसत आहे, ज्याचे डोळे स्निग्ध आणि पांढरे आहेत, (कपाळावर) पिंगट जटा रुळत आहे, चंद्रासारख्या मनोहर कांतीचा, ज्याच्या भिंवया, छाती, दाढीमिशा आणि बुबुळे काळीं आहेत, स्वभावतः निर्मल अशा दंतपंक्तीने ज्याचे मुखकमल शोभत आहे असा आपल्या दोन हातांनी अभय आणि वर मुद्रा दर्शविणारा तो भगवान दत्तप्रभू सदैव माझ्या हृदयांत वास करो. श्रीदत्तात्रयवज्रकवचांत जवळजवळ हेच ध्यान आहे.१०६-११०.

**कलौ द्विराविरासीत्स दीनान्त्रातुं जनान्कलौ । सद्धर्मगुप्त्यै श्रीपाद-नरहर्यभिधानतः ।।१११।।**
**उड्डीयन्ते यथाशक्ति यथोच्चावचपक्षिणः । अनन्तेऽनन्तलीलां तन्न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।११२।।**

**।। इति श्रीगुरुचरिते श्रीगुरुस्तुतिः ।।**

सः कलौ दीनान् जनान् त्रातुं श्रीपाद+नरहरि+अभिधानतः कलौ द्विः आविरासीत्। यथा उच्च+अवच+पक्षिणः अनन्ते यथा+शक्ति उड्डीयन्ते तत् न्यायात् अनन्त+लीलां यथा+मति वक्ष्ये।

कलिकाळांतील दीन जनांचे रक्षण करण्यासाठी, तो श्रीपाद आणि नरहरी या नांवांनी साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी कलियुगांत दोन वेळां अवतरला.१११. असीम गगनांत लहान-मोठे पक्षी जसे आपापल्या कुवतीने भरारी घेतात त्याप्रमाणे मी त्या भगवंताच्या अनंत लीला माझ्या मतीनुसार सांगत आहे.११२.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील श्रीगुरुस्तुति इथे पूर्ण झाली. ती श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)**

**ज्ञानयोगः ।**

**प्रथमोऽध्यायः ।**

**नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः । यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ॥१॥**

यत्+अज्ञानात् जगत् रज्जु+अहिवत् उदेति, यत्+तत्त्वं ज्ञानां मीलति तं चित्+आनंद+सत् गुरुं नौमि ।

आतां चरित्राला सुरुवात करतात. ॐ ***रचतो श्रीगुरुदत्तप्रेरणेने श्रीगुरुचरितार्थबोधिनी । पूर्वाचार्यमतानुसारी टीका पहावी निर्मत्सर सर्वांनी ।*** या भूलोकीं ही खरोखर विचित्र, अतिगंभीर आणि दुस्तर अशी माया आहे, जिच्यामुळे हे सर्व जीव परमार्थतः परमार्थरूप असूनही तसा बोध करूनही 'मी परमात्मा आहे' असे उमजत नाहीत. उलट घटादि जड पदार्थांप्रमाणे दिसणाऱ्या अनात्म अशा देह, इंद्रिय आदींच्या संघाताला आपले स्वरूप मानून 'मी ब्राह्मण, अमक्याचा पुत्र' इत्यादि कल्पना (कुणी) न सांगतांही करून घेतात. खरोखर परमात्म्याच्या मायेने भुललेले बहुतेक सर्वही लोक अशा भ्रमांत पडलेले असतात. ह्या भ्रमाच्या परिहारासाठीच मातापित्यांच्या शतपट श्रेष्ठ अशा श्रुतीमाउलीने (वेदरूपी मातेने) आणि परमकारुणिक भाष्यकार पूज्यपाद आचार्यांनी निरनिराळ्या प्रकारे समजावूनही, व्याधीमुळे गोडीसाठी कडुलिंबच सेवण्यास प्रवृत्त होणाऱ्या बालकासारखे, ज्यांचे चित्त विषयाकडे ओढले जाते अशा संसारी जीवांना तो बोध रुचत नाही. त्यासाठी खडीसाखरेसारखा सगुण ब्रह्माच्या प्रसादाच्या फलाद्वारे, त्या संसारी जीवांना आदरपूर्वक परमतत्त्वाकडे प्रवृत्त करण्यासाठी श्रीदत्तप्रभूंच्या प्रेरणेने आत्रेयगोत्री वासुदेव नांवाचा कोणी एक ब्राह्मण, वेदांचे सार ज्यांत आले आहे असा श्रीगुरुचरितम् ग्रंथ रचण्यासाठी, 'काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून, प्रारब्ध भोगूनच संपवून आणि नित्यकर्मांच्या अनुष्ठानाने प्रत्यवाय टाळून अनायासेच स्वरूपाची प्राप्ति हाच मोक्ष', किंवा 'निरतिशय प्रीतीने

स्वर्गादि शब्दांनी निदर्शिलेल्या लोकांची कर्मानेच प्राप्ति होत असल्याने कर्मानेच मोक्ष' इत्यादी पूर्वपक्षांचे निराकरण करून शेवटी 'अविद्या, काम आणि कर्म यांची निवृत्ती करून स्वस्वरूपांत स्थिरावणे हाच मोक्ष; स्वतः आत्माच ब्रह्म असल्याने त्याचे अपरोक्ष ज्ञान झाल्याने अविद्याची निवृत्ती म्हणजेच मोक्ष' ह्या आचार्योक्त्यनुसार साक्षात् मोक्ष देणारे ज्ञानकांडच प्रधान असल्याने, भगवद्गुणांसहित ज्ञानकांडाचे निरूपण करण्यासाठी, तसेच त्याच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठी शिष्टाचारानुसार, अनुष्टुभ छंदांत मंगलाचरण केले आहे. **प्रथमाध्यायीं श्रीगुरु स्तविला श्रीगंधर्वपुरी । नामधारका स्वप्नदर्शने कृपा करी ।।१।।**

ज्याच्या अज्ञानाने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे हे जग प्रकटते आणि ज्ञानी लोकांना जे तत्त्व पुनः मिळते त्या चिदानंद सद्गुरूंना मी वंदन करतो.

त्या चैतन्य, आनंद आणि सत्यस्वरूपी गुरूंना नमन करतो. कोण हा गुरू? ह्या प्रपंचरूपी आभासाचे अधिष्ठान, जगताचे उपादान कारण, स्वतःच्या माया नांवाच्या अनिर्वाच्य शक्तीने युक्त, सत्य, ज्ञान, अनंत आदि लक्षणांनी युक्त, दत्त नामक जो सर्वेश्वर, त्याच्या अज्ञानाने - अविद्याजनित व्यामोहाच्या बंधनाने, दोरीवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणे हे नामरूपात्मक जगत् उगवते, प्रकट होते. या ठिकाणी रज्जुसर्पाच्या दृष्टांताद्वारे वेदसंमत विवर्तवादाचाच अंगीकार केला आहे; आरंभवाद किंवा परिणामवादांचा नाही. त्यावरून आत्मा हा अवयव, अवयवी पदार्थांत गणला जात नसल्याने, तसेच त्याचे द्रव्यत्वही मानतां येत नसल्याने, त्याचा जगताशी समवाय अथवा संयोग संबंध होऊं शकत नाही, तर केवळ अध्यासच जाणावा. अशा अज्ञानापासूनच प्रपंचाची उत्पत्ति सांगितली. अशा प्रकारचे हे जगत् ज्याला न जाणल्याने (ज्याच्या अज्ञानाने) प्रकटते आणि **यत्तत्त्वं** ज्या (अज्ञानामुळे पसरलेल्या) जगताचे तात्त्विक स्वरूप **ज्ञानां** विवर्ताच्या (आभासाच्या) अधिष्ठानभूत परब्रह्माला अभेदाने जाणणाऱ्यांना **पुनर्मीलति** परत लोप पावते. त्याला नमस्कार करतो असा संबंध आहे. दोरी आणि सर्प यांचा दृष्टांत देहलीदीप न्यायाने दोन्हीकडे लागू आहे. लौकिक

अनुभवांत दोरीचा विवेक केल्यावर जशी 'हा सर्प आहे' ही बुद्धी दूर होते, तसेच ज्यांना सच्चिदानंदाचा विवेक होतो त्यांचा तद्विपरीत जगदाभास *'यतो वाचो निवर्तन्ते'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मानंदवल्ली २:४) ह्या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे तो मिथ्या असल्याने नाहीसा होतो. हेच असे सांगतां येईल कीं विवर्तावर अध्यासलेले जगत् अज्ञानाचा विलास असल्याने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे मिथ्या होण्याच्याच योग्यतेचे आहे.

इथे एक अशी शंका उपस्थित होऊं शकते की जगताच्या उत्पत्तीचे कारण ब्रह्मदेव (किंवा प्रधान) आहेत असे वेदांत सांगितले आहे. तर इथे परमेश्वरापासूनच जगताची उत्पत्ति प्रतिपादिली आहे. याचे समाधान असे आहे. 'जो ब्रह्मादेवाला आधी निर्माण करतो (*यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम्*)' हे वेदवाक्य (श्वेताश्वतर उ. ६:१८) आणि *'गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे'* हे गीतावचन ब्रह्मदेव परमेश्वराचा शिष्य असल्याचे प्रतिपादन करतात. तसेंच *'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्'* (श्वेताश्वतर उ. ४:१०) ह्या मंत्रानुसार माया ही परमेश्वराचीच शक्ती आहे आणि ती अचेतन आहे त्यामुळे परमेश्वरालाच जगदुत्पत्तीचे कारण मानावे लागेल.

**चित्** चैतन्यस्वभाव, जड नसलेला, स्वयंप्रकाश; निरतिशय, निरुपाधिक, नित्य आनंद सत्य, त्रिकालाबाधित असा हा गुरूच जगताच्या उत्पत्ति, स्थिति, लय यांचे कारण आहे; ब्रह्मा, प्रधान, अणू किंवा असत् हे नाहीत. शारीरकमीमांसेच्या दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत *'रचनानुपपत्तेच'* अशी सुरुवात करून आठ अधिकरणांत ह्या सर्व मतांतरवादांचे निराकरण केलेले आहे. ते तिथेच पहावे. त्याचप्रमाणे *'तस्माद्वा एतस्मादात्मान आकाशः संभूतः'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मवल्ली २.१), *'यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. भृगुवल्ली ३.१) हेच दर्शवितात.

इथे (**चिदानंदसद्** ह्या पदांत) संसर्ग वा विशिष्ट वाक्यार्थ न घेतां (श्रीमच्छंकराचार्यांनी) वाक्यवृत्तींत सांगितल्याप्रमाणे

(*संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र संमतः। अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषो मतः।।३८।।*) अखंडार्थ घ्यावा. गुरुशब्दाने दर्शविलेले *ब्रह्म चिदानंदसत्* ह्या शब्दांसहित अखंडैकरस जाणावेत. उदाहरणार्थ लोहितोष्णप्रकाशप्रदीप. लाल, उष्ण आणि प्रकाश हे दीपांत एकाच वेळी जाणवतात आणि त्यापासून अभिन्न असतात.

इथे जीवाचे संसारित्व आणि दुःखित्व हे नित्य आहे ह्या वादाच्या निरासासाठी पुनः शब्दाची योजना करून *'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'* (बृहदारण्यक उ. ४.४.६) ह्या वेदवाक्याचा अर्थ स्पष्ट केला आहे.

**ज्ञानाम्** हे अनेकवचन वापरून 'एकमुक्तौ सर्वमुक्तिप्रसंगः' ह्या पक्षाचे निरसन केले आहे. ज्ञ शब्दाने *'ज्ञोऽत एव'* (ब्रह्मसूत्र २.३.१८) ह्या अधिकरणन्यायाची पुष्टी केली आहे. ह्याने जीवाचे नित्यत्व, चिद्रूपत्व (ते अचिद्रूप - जड नाही) सुचविले आहे. कारण सुषुप्ति आदि अवस्थांतही तो साक्षित्वाने असतो. तर मग सुषुप्त्यादि अवस्थांत द्वैताची प्रतीती कां नसते? असे म्हणाल तर बृहदारण्यक उपनिषदांत (४.३.२२) 'यद्वै तन्न पश्यति' असे म्हटले आहे. किंवा *'यः सर्वज्ञः सर्ववित्'* (मुंडक उ. १.१.९) ह्या श्रुतीप्रमाणे **ज्ञ** शब्दाचा अर्थ ईश्वर असा करतां येईल. म्हणजेच ज्ञानी हा सर्वेश्वराहून वेगळा नाहीच. *'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति'* (मुंडक उ. ५.२.९) ह्या श्रुतीने आणि *'ज्ञानी त्वात्मैव मे मतः'* ह्या भगवद्वचनाने (भ.गीता ७.१८) ह्याचे समर्थन केले आहे.

हे शास्त्र आरंभणीय आहे की नाही असे विचाराल तर विषय आणि प्रयोजन असल्यामुळे *'अथातो ब्रह्मजिज्ञासा'* (ब्रह्मसूत्र १.१.१) या न्यायानुसार ते आरंभणीय आहे. सर्व अनर्थांचे मूळ असलेल्या प्रपंचाची निवृत्ती हे प्रयोजन आहे. तसेच ह्या प्रपंचरूपी विवर्ताचे अधिष्ठान जे ब्रह्म त्याचे ज्ञान हा विषय आहे. त्या(ब्रह्मज्ञाना)ची इच्छा करणारा साधनचतुष्टयसंपन्न ब्राह्मण हा अधिकारी आहे असे समजावे।।१।।

**भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया । विदास्यैक्यं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ।।२।।**

एकं सत् परं ब्रह्म धी+भेदात् अनेक+रूपया भाति। विदा अस्य ऐक्यं तत् सत्यं दत्त+संज्ञितम्।२।

एकच परब्रह्म असूनही बुद्धिवृत्तींच्या भेदांमुळे अनेकासारखे भासते. ह्याचे ज्ञानाने ऐक्य होते तेच दत्त नांवाचे सत्य होय. 'श्रेयांसि बहुविघ्नानि' ह्या उक्तीला अनुसरून *'एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः। एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत्।'* (त्रिपुरतापिनी उ. ५.१२), *'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'* (पैंगल १.१), *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०), *'नेह नानास्ति किंचन'* (बृहदारण्यक उ. ४.४.१९) ह्या वेदवाक्यांनी प्रतिपादिलेले ऐक्यात्म्य वस्तुनिर्देशात्मक (आणखी एका) मंगलाचरणाद्वारे सांगतात. *'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्'* (छांदोग्य उ. ६.२.१) ह्या श्रुतीने द्वैताचा निषेध करून प्रतिपादिलले **एकं** सजातीय आणि विजातीय भेदांनी रहित, **सत्** त्रिकालाबाधित देश, काल, वस्तु अशा कुठल्याही विभागणीच्या पलीकडील **परं ब्रह्म** परब्रह्म **धीभेदात्** अंतःकरणाच्या उपाधीमुळे, देव, मानव, पशु आदि अनेक रूपांनी **अनेकवत्** वि**भाति** भासते **तत्** ते खरे तर *'तत्त्वमसि'* (छांदोग्य उ. ६.८.७) ह्या उपनिषद्वाक्यानुसार एकच आहे.

**शंका -** सृष्टीच्या पूर्वी आपण म्हणतां तसे ते एकच असेलही. आतां स्थितीच्या काळांत सर्वांच्या अनुभवाच्या प्रत्यक्षादि प्रमाणानुसार सर्वांच्या प्रत्ययाला येणारे खाणे-पिणे इत्यादि व्यवहारांतले जगत् नामरूपात्मकच असून ते अनेकत्वानेच बनलेले आहे.

**समाधान -** भागत्यागलक्षणेच्या द्वारा **विदा** ज्ञानाने **अस्य** ह्या विद्यमान जगच्चालक व भासक सत्याचे **ऐक्यं** एकत्व *'अयमात्मा ब्रह्म'* (बृहदारण्यक उ. २.५.१९) ह्या श्रुतिवचनाप्रमाणे निर्बाध आहे.

**पर्यायी अर्थ -** किंवा असेही म्हणतां येईल की पहिल्या श्लोकाने तत्पदार्थ सांगितला आहे व ह्या दुसऱ्या श्लोकाने त्वंपदार्थ! **एकं** साक्षित्वाने जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनही अवस्थांत विद्यमान असणारे, **सत्** प्रत्यग्रूप, **धीभेदात्** (धी शब्दाचा इंद्रिय असा अर्थ करून) भिन्न भिन्न श्रोत्रादि इंद्रियांच्या शब्दादि विषयांच्या उपाधींमुळे **अनेकवत्** विखुरल्यासारखे भासते. प्रत्यक् रूप स्वभावतः शुद्ध असूनही मलिन उपाधींमुळे नाना रूपांनी नटल्यासारखे दिसते. जेव्हां उपाधिविशिष्ट गुणधर्मांना सोडून त्या त्या उपाधींच्या लक्ष्याचा शाखाचंद्रन्यायाने विवेक केला असतां उपाधिजनित अपकर्षाचा निरास होऊन प्रकृष्ट (आत्मरूपच) उरते. तेच चैतन्य श्रोत्रादि उपाधींत प्रवेशून ती ती कार्ये करतांना दिसले तरी उपाधिविशिष्ट चैतन्य गौण असून प्रत्यक् चैतन्यच मुख्य आहे. हाच विचार बृहदारण्यक उपनिषदांत (१.४.७) *'स एव(ष) देहे प्रविष्टः'* (तोच हा (जीव) देहांत प्रवेश करून) अशी सुरुवात करून *'तन्न पश्यांत्यकृत्स्नो हि स प्राणन्नेव हि प्राणनामको भवति वदन् वाक् पश्यंचक्षुः, शृण्वन् श्रोत्रं मन्वानो मन एतानि कर्मनामधेयानि भवन्ति'* असा विशद केला आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनी याचा असा अर्थ केला आहे. देहांत नखशिखांत प्रवेश करून ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या उपाधींचा आश्रय केलेल्या त्या आत्म्याला विवेकी पुरुष आपला आत्मा मानत नाहीत. कारण तो उपाधिविशिष्ट आत्मा एकसंध अविच्छिन्न नसतो. मग त्याला मुख्यात्मत्व कुठून येणार? प्राणचालनाने श्वासोच्छ्वास करतांना प्राणोपाधीच्या योगे तो प्राणनामक होतो. वाचा आदि उपाधींशी त्याचा संबंध तेव्हां नसतो. त्याचप्रमाणे एका एका उपाधीशी संलग्न असतांना तो इतरत्र जात नाही. जसे वाचेशी संलग्न असतांना तो चक्षु वा इतर उपाधीपासून दूर असतो. असा भिन्न भिन्न उपाधीच्या आश्रयाने तो विच्छिन्न भासतो. तर त्याला एकसंध वा अखंड कसे मानतां येईल? अशी शंका घेतल्यास त्याचे उत्तर असे आहे - शब्दादि उपाधिविशिष्ट भावांचा त्याग करून एकरूप **विदा** बुद्धीने **अस्य** ह्या प्रत्यगात्म्याचे **ऐक्यं** एकत्व कळते. बृहदारण्यकांतही म्हटले आहे *'आत्मानमेवोपासीत तर्ह्येके एकीभवन्ति'* (१.४.८). **तत्** ते एकत्वाने निचित केलेले **सत्यं** पूर्ण, निर्बाध, तत्त्वंपदार्थांच्या सामरस्याने अखंडैकरस **दत्तसंज्ञित** दत्त नामक पूर्ण ब्रह्म होय.

सूर्यपक्षी ह्या श्लोकाचा असा अर्थ लावतां येईल. *'एकैव वा महानात्मा देवता। स सूर्य इत्याचक्षते'* (कात्यायनकृत ऋग्वेदसर्वानुक्रमणिकांतर्गत द्वादशकांडी परिभाषा २.१४.१५) इत्यादींनी सांगितलेले सूर्यात्मक तेज *'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च'* (ऋग्वेद १.११५.१) याप्रमाणे **एकं सत्** एक असूनही *'इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुः'* (ऋग्वेद १.१६४.४६) इत्यादि श्रुतिप्रणीत देवतारूप **धीभेदात्** बुद्धीने *'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति'* (ऋग्वेद १.१६४.४६) या वेदवाक्यानुसार **अनेकवत् भाति** अनेक देवतारूप भासतो.

विष्णु, दत्तात्रेय, देवी, शिव यांच्या पक्षी **एकं सद्** त्या त्या देवतांचे एकच रूप वरच्या, खालच्या, उजव्या, डाव्या इत्यादि हातांनी धारण केल्या आयुधांच्या **धीभेदात्** निरनिराळ्या क्रमांच्या विचाराने **अनेकवत्** विभिन्न व्यूहांसारखा (केशव, नारायणादि) भासतो. त्यानुसार चतुर्भुज विष्णूचे २४, षड्भुज श्रीदत्तात्रेयाचे ७२०, अष्टभुजा देवीचे ४०३२० तर दशभुज शिवाचे ३५२८८०० भेद जाणावेत।।२।।

**बोद्धुं भूत्वात्रिपुत्रः स्वपदरसपरान्दिव्ययोगेन बालान् ।**
**दत्ताख्यः कार्तवीर्यं यदुमपि च समान्स्वाश्रितानुद्दधार ।**
**भूयोऽन्यान् श्रीपदाख्यः पुनरपि नृहरिः संज्ञया स्वीयभक्तान्।**
**कृष्णाभीमातटस्थो जयति परगुरुः स्मर्तृगाम्येष दत्तः ।।३।।**

स्व+पद+रस+परान् कार्तवीर्यं यदुं अपि च समान् स्व+आश्रितान् बालान् दिव्ययोगेन बोद्धुं दत्त+आख्यः अत्रिपुत्रः भूत्वा भूयः श्रीपद+आख्यः पुनः अपि नृहरिः स्वीय+भक्तान् उद्दधार। एष कृष्णा+भीमा+तट+स्थः पर+गुरुः स्मर्तृगामी दत्तः जयति।३।

आपल्या पदाच्या रसांत निमग्न असणाऱ्या, कार्तवीर्य आण यदु यांसारख्या आपल्याला शरण आलेल्या बालकांचा अत्रि मुनींच्या पोटी दत्त नांवाने अवतरून उद्धार केला. पुढेही श्रीपाद व नंतर नरहरि नाम धारण करून आपल्या इतरही भक्तांचा उद्धार करून तो परगुरु, स्मर्तृगामी दत्त कृष्णा आणि भीमा यांच्या तीरांवर विराजत आहे. हे (उपरिनिर्दिष्ट) वर्णन मुनिपुत्र दत्तात्रेयाला कसे लागूं पडेल ह्या शंकेच्या अपेक्षेने सांगतात. आपल्या षड्गुण ऐश्वर्यासह, स्वतःच्या शुद्ध चिदानंदैक स्वरूपानेच लोकशिक्षणासाठी - स्वात्मतत्त्वाच्या **बोद्धुं** उपदेशासाठी - उपासना, योग आदि उपायांनी प्राप्त होणाऱ्या स्वात्मतत्त्वाच्या ज्ञानासाठी *'अधीहि भगवो ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. ३.१.१) ह्या उक्तीप्रमाणे तसेच *'आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च'* या ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) **अत्रिपुत्रो भूत्वा** अत्रिमुनींच्या घरी अवतरून **स्वस्य पदं** पद्यते म्हणजे योग्यांना प्राप्त होते ते पद; देश-काल-वस्तु यांनी अपरिच्छिन्न असा जो चिन्मय आनंदरूपी रस, *'रसो वै सः'*, *'रसँ ह्येवायं लब्ध्वानन्दी भवती।'* (तैत्तिरीय उ. २.७.१) ह्या श्रुतींनी वर्णिलेला स्वरूपानंद; त्यांत निमग्न असलेल्या **बालान्** बालकाप्रमाणे मानावमानचिंतारहित निरागस वृत्ती धारण केलेल्या; सगुणपक्षी आपल्या चरणाच्या भजनाच्या आनंदांत मग्न असलेल्या व बालवत् विषयांत रमणाऱ्या, कृतवीर्याचा मुलगा **कार्तवीर्य** तसेच ययातिपुत्र **यदु** आणि **समान्** त्यांच्यासारख्या इतर सर्व **स्वाश्रितान्** आपल्या प्रह्लादादि भक्तांचा **दिव्ययोगेन** दिव्य म्हणजे ज्ञानात्मक उपनिषत्प्रणीत

योग म्हणजे उपाय. ह्या योगाचा अवलंब करणाऱ्यांचे गर्भावास, जन्म, जरा इत्यादी क्षीण होतात किंवा नाश पावतात आणि ते ब्रह्माकडे प्रगत होतात. ह्या योगाचा उगम उपनिषदांत असल्याने व वेदांनी ब्रह्माला औपनिषद पुरुष म्हटले असल्याने, (*'तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि।'* बृहदारण्यक उ. ३:९:२६) तो दिव्य योग आहे. उपनिषदांचे शाब्द ज्ञान परोक्ष असले तरीही त्याच्या श्रवण-मननांनी संशयभावना, असंभावना आणि विपरीतभावना दूर होऊन तेच अपरोक्ष ज्ञानांत परिणत होते. दिव्य योग या शब्दाचा अर्थ, *'आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिं। ध्याननिर्मथनाभ्यासात् देवं पश्येन्निगूढवत्।।'* (ध्यानबिंदूपनिषत् २२) (आत्म्याची अरणी आणि प्रणवाचा मंथा करून ध्यानरूपी मंथनाच्या अभ्यासाने अंतरांत लपलेला देव (प्रकट करून) पहावा.) ह्या वचनानुसार ध्यानयोग असाही करतां येईल. *'नान्यः पंथा विद्यतेऽयनाय'* (आत्मप्राप्तीसाठी दुसरा मार्ग नाही) (श्वेताश्वतर उ. ३:८, ६:१५) ह्या मंत्रानुसार या अष्टांगयोगाने आणि ज्ञानयोगाने **उद्दधार** *'पादोऽस्य विश्वा भूतानि'* (ऋग्वेद संहिता १०:९०:३) ह्या मंत्रांत प्रतिपादलेल्या मायाप्रपंचरूपी पायाच्या वर त्याच मंत्रांत पुढे सांगितलेल्या *'त्रिपादस्यामृतं दिवि'* तेजोमय, स्वयंप्रकाश अशा अमृतस्वरूप परब्रह्मांत अभेदाने ठेवले. म्हणजेच उपरिनिर्दिष्ट स्वभक्तांना आपल्यासारखेच केले. जरी निरंश अनंत अशा ब्रह्माच्या ठायीं अंशाची कल्पनाही करतां येत नाही तरीही *'निरंशेऽप्यंशमारोप्य कृत्स्नेंऽशे वेति पृच्छतः। तद्भाषयोत्तरं ब्रूते श्रुतिः श्रौतहितैषिणी।।'* (अंशरहित ब्रह्मावर अंशाची कल्पना करून त्याच्याविषयी पूर्ण कीं अंश असे विचारणाऱ्याला, ऐकणाऱ्याच्या हितासाठीच श्रुतिमाउली त्याच्याच भाषेंत उत्तर देते) (पंचदशी २:५८) ह्या वचनानुसार समोरच्याला त्याच्याच भाषेच समजावण्यासाठी तसा शब्दप्रयोग केला आहे. **भूयः** पुन्हां कांही काळाने श्रीपाद श्रीवल्लभ नांवाने **अन्यान्** आणखी भक्तांचाही उद्धार केला. कलियुगांतच **पुनरपि** पुन्हा एकदा नरहरि नांव घेऊन सिद्ध सरस्वती आदि **स्वीयभक्तान्** आपल्या भक्तांचा उद्धार केला. अशा रीतीने भगवंताची कृपाच भक्तांच्या मोक्षाला कारण होते. *'एष एव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो उन्निनीषते एष*

**योऽजोऽक्रियोऽस्पृहोऽप्येको बहुः स्यामिति तृष्णया । प्रकृत्या गुणमय्येदं ततानेशो जगत्प्रभुः ।।४।।**

यः अजः अक्रियः अस्पृहः प्रभुः अपि एकः बहुः स्याम इति तृष्णया गुणमय्या प्रकृत्या जगत् ततान।४।

*एवासाधुकारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो निनीषते।'* (हाच परमात्मा यमलोकांपासून वर काढण्यासाठी सत्कर्माची प्रेरणा देतो आणि हाच यमलोकांत ढकलण्यासाठी दुष्कर्माकडे प्रवृत्त करतो.) (कौषीतकी ब्राह्मण उ. ३:८) ही वेदोक्ति हेच सांगते. ह्यांत परमेश्वराला वैषम्य (पक्षपात) आणि नैर्घृण्य (दुष्टपणा) हे दोष किंवा त्याचे पापपुण्य लागत नाहीत. कारण तो ज्याला त्याला आपापल्या कर्मानुसार फळे देत असतो. कृष्णाकांठी नरसोबावाडी इत्यादि ठिकाणी तसेच भीमातीरी गाणगापूर येथे राहणारा दलादनमुनींच्या वचनानुसार **स्मर्तृगामी** 'स्मरतां दर्शन देणारा' **एषः** हा स्वयंप्रकाश अपरोक्ष **परगुरुः** पर म्हणजे ब्रह्मदेवादिक, त्यांचाही पतंजलींच्या वचनानुसार (*स एव पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्*)(काळाने न भंगणारा तोच प्राचीनांचाही गुरू आहे) (योगसूत्र १:२६) गुरु, **दत्तः** दत्तप्रभू **जयति** स्वभक्तांचा उद्धार हाच जय मिळवीत आहे. ३.

**यः** जो आधीच्या लोकांत वर्णन केला तो **अजः** जन्म, वृद्धी, परिणाम, अस्तित्व, क्षय आणि नाश या सहा विकारांच्या पलीकडला (*'महानज आत्मा'* बृ.उ. ४:४:२४); **अक्रियः** क्रिया म्हणजेच कर्माच्या अतीत असलेला. हे पातंजल योगसूत्रातील क्लेश, कर्म, विपाक, आशय ह्यांचे उपलक्षण आहे. (*'क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः'* योगसूत्र १:२४); **अस्पृहः** वेदांत वर्णिल्याप्रमाणे आप्तकाम (बृ.उ. ४:४:६) असल्याने निरिच्छ; **एकः** ऐतरेय उपनिषदांत (१:१:१) सांगितल्याप्रमाणे (*आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्*) अद्वितीय; अशा ईश्वरापासून जगत् निर्माण होणे असंभव असल्याने वेदवचनांनी मायासहित उपादानाच्या विधानांना (*'मायां तु प्रकृतिं विद्यात्'* श्वे.उ. ४:१०), (*'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते'* ऋ.सं. ६४:७:१८) अनुसरून ईश्वराने मायेचा अंगीकार केला. ह्याचा अर्थ माया ही ईश्वरापासून भिन्न आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. कारण ती ईश्वराचीच शक्ती असून तिला वेगळे वस्तुत्व नाही.

त्यामुळे तिची वेगळी गणना करतां येत नाही. कांही कार्यासाठी मालकाने आपल्या चाकराला दिलेले धन जसे त्याचे होत नाही किंवा पाण्यात पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला शहाणा माणूस दुसरा चंद्र म्हणत नाही त्याप्रमाणे! हेच व्यास महर्षींनी *'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टांतानुपरोधात्'* (१:४:२३) या सूत्राद्वारे प्रतिपादले आहे. हा जो परमेश्वर तो केवळ निमित्तकारणच नसून तोच प्रकृतिरूप उपादानही आहे. वेदांत एका ब्रह्माचे विज्ञान झाले की सर्वांचे विज्ञान होते असे विधान (सर्वविज्ञानप्रतिज्ञा) आहे. (*'येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातम्'*, छां.उ. ६:१:३). त्याला जोडूनच मातीच्या गोळ्याचा दृष्टांत आहे. एका मातीच्या वस्तूचे ज्ञान झाले की सर्व मृन्मय वस्तूंना जाणल्यासारखे आहे. त्या वस्तूंना विविध आकारांनुसार निरनिराळी नांवे दिली तरी त्या सर्वांचे स्वरूप मातीचेच आहे. (*'यथा सोम्येकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद् वाचारंभणं विकारो नामधेयम्'*, छां.उ. ६:१:४) वरील प्रतिज्ञेनुसार आणि दृष्टांताच्या अनुरोधाने प्रकृति ईश्वरापासून अभिन्न आहे असे प्रतिपादन व्यासांनी ह्या सूत्रांत केले आहे. **गुणमय्या प्रकृत्या** अशा ह्या त्रिगुणात्मक प्रकृतीद्वारा **ईश** सर्वज्ञ, स्वतंत्र, भगवान प्रभु, **बहु स्याम्** अनेक रूपें धारण करावीत **तृष्णया** अशा इच्छारूपी संकल्पाने **जगत् ततान** विश्वाचा पसारा मांडला. ईश्वर *'सत्यकाम सत्यसंकल्प'* (छां.उ. ८:१:५) असल्याने त्याचा संकल्प केवळ मनोराज्य नसल्याने प्रत्यक्षात उतरतो. ह्यासाठी ईश्वराला फारसे प्रयास पडले असे नाही. *'स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीप्रमाणे तपोरूपी साधनाची अपेक्षा असली तरी *'बहुः स्याम्'* ह्या संकल्पांत अंतर्भूत असलेले, निर्माण करायच्या जगताचे पर्यालोचन (conception) हेच ते तप होय. कृच्छ्रादि नव्हे. *'यस्य ज्ञानमयं तपः'* (मुं.उ. १:१:३) असे श्रुतिवचनच आहे. **जगत् ततान** असे म्हटले आहे ते घटादिकांप्रमाणे जड नव्हे. तर पुढच्याच श्लोकांत सांगितल्याप्रमाणे देह, बुद्धी, इंद्रिये यांच्यापासून बनलेले आहे. कुंभाराने घडवलेल्या, घडा, सुरई इत्यादि मातीच्या वस्तूंपासून वेगळे, ज्याचे निमित्त आणि उपादान कारण एकच (ईश्वर) आहे. जीवांच्या कर्मादिकांनुसार देश, काल, नाना रूपे, पूर्वकल्पासारखेच सर्वही प्राणिमात्रांना अनुभवाला येणारे असे हे जगत् आहे. त्याच्या अंतरांत, पाहणारा, ऐकणारा, विचार करणारा, जाणणारा इत्यादि विशेषणांनी युक्त अशा स्वरूपांत *'तत्सृष्ट्वा*

**आब्रह्मस्तम्बपर्यन्तं देहबुद्धीन्द्रियात्मकम् । सृष्टं चराचरं तत्र संवित्पात्रं नरोत्तमः ।।५।।**

आ+ब्रह्म+स्तंब+पर्यन्तं देह+बुद्धि+इन्द्रिय+आत्मकं चर+अचरं सृष्टम्। तत्र नर+उत्तमः संवित्+पात्रम्।५।

*तदेवानुप्राविशत्'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीनुसार अनुप्रवेश करून त्याचा विस्तार केला. हा अनुप्रवेश घरांत प्रवेशणारा देवदत्त अथवा जलांत प्रतिबिंबित झालेला सूर्य यांसारखा नसून द्रष्टा इत्यादि लक्षणांनी युक्त जीवरूपाने होणारा आहे.४.

ब्रह्मदेवापासून स्थावरांपर्यंत देह, बुद्धी, इंद्रिये धारण करणारे जे चराचर (जीवमात्र) ईश्वराने निर्मिले आहेत त्या सर्वांत श्रेष्ठ मानवच (ईश्वरी) ज्ञानाचा अधिकारी आहे.

*'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे'* ह्या ऋचेनुसार (१०:१२१:१) व *'स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते'* ह्या पुराणवाक्यानुसार (कूर्मपुराण पूर्वभाग ४:३८) ब्रह्मदेव हेच आद्य व श्रेष्ठ शरीरधारी असल्याने त्यांच्यापासून स्थावरांपर्यंत देहबुद्धीन्द्रयात्मक जगताची उत्पत्ति केली. त्या सर्वांत ज्ञानयोग्य असे केवळ मानवशरीरच आहे. ऐतरेय उपनिषदांत सांगितले आहे की ईश्वराने अचेतन लोकांच्या रक्षणासाठी देवांची निर्मिती केली. त्यांच्या प्रार्थनेनुसार भगवंताने गाय इत्यादि पशू (अस्तित्वांत) आणले. त्या सर्वांत 'हा आम्हांला पुरेसा नाही' (*'न वै नोऽयमलम्'*, ऐ.उ. १:२:२) असे म्हणणाऱ्या देवतांना जेव्हां शेवटी विवेकसंपन्न माणूस (अस्तित्वांत) आणला तेव्हां 'हे फार छान केले' (*'सुकृतं बत'*, ऐ.उ. १:२:३) असे त्या म्हणाल्या. ऐतरेय आरण्यकांतही मनुष्याचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. 'मानवांतच आत्म्याचा विकास होतो. तोच प्रज्ञानसंपन्न होतो. ज्ञानाची अभिव्यक्ति करतो, ज्ञान पाहतो, उद्यांची (भविष्याची जाणीव) त्यालाच आहे; इहपरलौकिकांना जाणून मर्त्य असूनही अमृतत्वाची इच्छा करतो. अर्थातच तहान, भूक इत्यादि शारीरिक प्रवृत्ती हीच ज्ञानाची परिसीमा असणाऱ्या इतर पशूंपेक्षा तो संपन्नतम आहे' (ऐ. आरण्यक २:३:२). ज्ञानकर्मांची शक्ती व जिज्ञासा असणारा व त्यांच्या तत्त्वाला जाणू शकणारा पुरुषच साधक, विद्वान् व समर्थ असल्याने त्यालाच ज्ञान व कर्म यांचा

अधिकार आहे.

**विषय -** 'शास्त्रयोनित्वात्' (शास्त्राच्या उगमावरून) ब्रह्मसूत्राप्रमाणे (१:१:३) अद्वितीय आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचा एकमेव उगम असल्याने उपनिषद हा विषय होय.

**अधिकारी -** त्याचा अधिकारी ब्राह्मण होय. कारण तोच विवेकाने 'हे मना! तू का असा पिशाचासारखा सूसाट धावत आहेस? स्वतःसाठी म्हणावे तर तू जड असल्याने प्रयोजन होऊं शकत नाहीस. विषयांसाठी म्हणावे तर ते क्षणभंगुर इत्यादि दोषांनी ग्रस्त असल्याने तुझ्या धांवपळीचे प्रयोजन असूं शकत नाहीत. चैतन्याच्या प्राप्तीची जर तुझी इच्छा असेल तर ते असंग, परमानंदस्वरूप असल्याने ते तुझ्या धांवाधांवीने नाही तर तुझ्या (मनाच्या) नियंत्रणाने, विषयकल्पनांचा त्याग करून 'मी ब्रह्म आहे' ह्या एकाच विषयशून्य वृत्तीने ब्रह्मभावाची अभिव्यक्ती करणाऱ्या महावाक्यांच्या चिंतनांतूनच उगवणाऱ्या बुद्धिवृत्तीद्वाराच जाणतां येईल.'

इथे **नरोत्तम** या शब्दाने बुद्धीने परमार्थप्राप्तीचा निश्चय ज्याने केला आहे असा ब्राह्मण असा घ्यावा. गरुडपुराणांत म्हटले आहेच 'सर्व जीवांमध्ये प्राणी श्रेष्ठ आहेत, त्यांतही बुद्धिजीवी, बुद्धिमानांत माणूस, माणसांतही ब्राह्मण, ब्राह्मणांत विद्वान् आणि विद्वानांत कृतबुद्धी श्रेष्ठ जाणावेत.' ('भूतानां प्राणिनः श्रेष्ठास्तेभ्यो बुद्ध्युपजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणाः स्मृताः। ब्राह्मणेषु च विद्वांसो। विद्वत्सु कृतबुद्धयः।।' गरुड पुराण, प्रेतखंड, धर्मकांड, १२:११).५.

**इन्द्रियार्थे स्थितौ रागद्वेषौ येन जितौ स तु । दैवीसंपल्लभेन्मोक्षं तदर्थं संभवत्यजः ।।६।।**

इन्द्रिय+अर्थे स्थितौ राग+द्वेषौ येन जितौ दैवी+संपत् सः तु मोक्षं लभेत्। तत्+अर्थं अजः संभवति।६।

विषयांच्या ठिकाणी असलेले आकर्षण आणि तिरस्कार जिंकून जो दैवी संपत्ती मिळवतो त्यालाच मोक्षाचा लाभ होतो. त्याच्यासाठीच जन्म-मरणादि विकार नसलेला परमात्मा (या मनुष्यलोकांत) जन्म घेतो. 'स्वयंभू परमात्म्याने इंद्रियरूपी छिद्रे बहिर्मुख छेदली असल्याने (जीव) अंतरात्म्याला न पाहतां बाहेर पाहतो.' (कठ उ. २:१:१), 'ज्याचे श्रवणसुद्धा फार लोकांना लाभत नाही, श्रवण करणाऱ्यांतही बहुतेकांना जो समजत नाही' (कठ उ. १:२:७), 'वस्तऱ्याच्या धारेवर चालणे जसे कठीण तसा हा (परमात्मज्ञानाचा) मार्ग दुर्गम आहे' (कठ उ. १:३:१४) असे जर उपनिषदांतच सांगितले आहे तर त्या ज्ञानाची योग्यता मनुष्याला येते असे कसे म्हणतां येईल? अशी शंका घेतल्यास 'कुणी धीर पुरुष अमृतत्वाच्या इच्छेने आपल्या इंद्रियांचा संयम करून प्रत्यगात्म्याचे दर्शन घेतो' (कठ उ. २:१:१), 'शहाण्याने वाचेचा मनांत संयम करावा आणि त्याचा (मनाचा) निग्रह आत्मज्ञानासाठी करावा' (कठ उ. १:३:१३), 'जो केवळ आत्म्यालाच वाहून घेतो त्यालाच हा आत्मा आपल्या स्वरूपाची ओळख करून देतो' (कठ उ. १:२:२३) इत्यादि श्रुतींच्या प्रतिपादनावरून ही शंका निराधार आहे हे स्पष्ट करण्यासाठी ह्या श्लोकांत म्हणतात. सर्वच इंद्रियांच्या विषयांच्या ठिकाणी 'सुखाशी संलग्न असणारा राग' व 'दुःखाशी निगडित असणारा द्वेष' या पातंजल (२:७) उक्तीनुसार पूर्वजन्मातील संस्कारांनी घडलेल्या जीवाच्या प्रकृतींतील अनुकूल व प्रतिकूल प्रवृत्ती **येन** ज्याने भगवंताच्या ध्यानादिकांनी **जितौ** जिंकल्या आहेत **स तु** त्या रागद्वेषरहित साधकाला **दैवीसंपत्** दैवी संपदा प्राप्त होते व त्याचे अज्ञानकल्पित स्थूल देहापासून अहंकारापर्यंतचे सर्व बंध तुटून **मोक्षं लभेत्** मोक्ष मिळतो. श्रीमद्भगवद्गीतेतील *'इन्द्रियस्येन्द्रियार्थे..'* (३:३४) व 'दैवी संपद्विमोक्षाय' (१६:५) ह्या श्लोकांत हेच सांगितले आहे. गीतेच्या १६व्या अध्यायांत दैवी संपदेचे निरूपण आहे. **तदर्थं** त्या मोक्षाला योग्य अशा आपल्या भक्तासाठीच **अजः** अजन्मासुद्धा भगवंत **अवतरति** भूतलावर अवतरतो.६.

**गाढं प्रियोऽस्य भगवांस्तस्यायमपि तादृशः । गुप्त्या अवतरत्यस्य लीलाधाम्नाप्यजोऽव्ययः ।।७।।**
**युगे युगेऽवतीर्यापि कार्यान्ते व्यसृजत्तनूः । एवं ब्राह्मेऽह्नि संप्राप्तो युगाष्टाविंशपर्ययः ।।८।।**

अस्य भगवान् गाढं प्रियः, अयं अपि तादृशः। अस्य गुप्त्या अजः अव्ययः लीला+धाम्ना अवतरति।७। युगे युगे अवतीर्य अपि कार्य+अन्ते तनूः व्यसृजत्। एवं ब्राह्मे अह्नि युग+अष्ट+विंश+पर्ययः संप्राप्तः।८।

गीतावचनानुसार (७:१७) ह्या(भक्ता)चे भगवंतावर प्रगाढ प्रेम असते तसेच त्या(भगवंता)चेही तसेच ह्याच्यावर प्रेम असते. ह्याच्या रक्षणासाठीच जन्म-मृत्युरहित परमात्मा लीलादेहाने अवतार घेतो.७.

युगायुगांत अवतरून कार्याच्या शेवटी त्या त्या देहांचे विसर्जन करतो. अशा रीतीने ब्रह्मदेवाच्या २८व्या चतुर्युगीत सांप्रत दिवशीं वर्तमान वाराह कल्पांत, ('सध्याच्या वैवस्वत मन्वंतरांत' अध्याहृत आहे.).८. ह्या घोर कलियुगांत आपल्या अंशापासून झालेल्या देवतांची दयाशून्यता लक्षांत घेऊन खुद्द दत्त भगवंतांनीच अवतार घेतला.

**घोर कलियुग.** अधर्माच्या प्राबल्यामुळे कली घोर झाला आहे. ह्या कलीत *'मानव सगळे धर्मभ्रष्ट व लिंगजिह्वापरायण (असतील); ब्रह्मचारी व्रतहीन, संन्यासी कुटुंबवत्सल,।।१।। स्त्रिया कामासक्त तर गृहस्थ आचारहीन (असतील). ते देहाने छोटे, खूप खाणारे, मंदभागी, निर्लज्ज,।।२।। स्त्रीलंपट, विपुल संतति असलेले, मूर्ख आणि आपल्या नातेवाइकांना आणि मित्रांना सोडणारे,।।३।। स्त्रिया पतीची अवज्ञा करणाऱ्या, तर पुत्र पित्याचा द्रोह करणारे; नोकर धन्याला टाकणारे तर शिष्य पूर्णपणे गुरूला ठकविणारे!।।४।। म्लेच्छप्राय राज्यकर्ते प्रजेचे आर्थिक दृष्ट्या भक्षण करतील, ब्राह्मण कवडीसाठीही वेदांचा विक्रय करणारे, दुष्ट,।।५।। प्रतिग्रह आणि परस्त्री यांच्या मागे लागल्याने सिद्धिविवर्जित असतील. उच्चवर्णीय लोक हीन व्यवसाय करतील तर हीन लोक श्रेष्ठांचे।।६।। यज्ञयाग बंद झाल्याने वृष्टी आणि अन्न कुठेकुठेच उपलब्ध होईल (दुष्काळसदृश स्थिती).*

**दारुणेऽस्मिन्कलौ प्राप्ते ज्ञात्वा स्वांशांशजोतयः। दयोना इत्याविरासीद्दत्तस्तु भगवान्स्वयम् ।।९।।**

अस्मिन् दारुणे कलौ प्राप्ते स्व+अंश+अंश+ज+ऊतयः दया+ऊना इति ज्ञात्वा स्वयं भगवान् दत्तः तु आविरासीत्।९।

*पुरुष १६व्या वर्षी म्हातारे होतील (केस पांढरे) तर १० वर्षाच्या मुली माता होतील.।।७।। राज्यकर्तेच चोर, धर्मांत पाखण्डच अधिक, सर्व वर्ण शूद्रप्राय आणि मेंढीएवढ्या गाई।।८।। घरासारखे (भोगसाधनांनी समृद्ध) मठादिक तर घरे ओसाड होतील. वनस्पती अणूंप्रमाणे सूक्ष्म तर वृक्ष शमीप्रमाणे लहान।।९।। ढग नुसते विजेसारखे चमकतील (वर्षणार नाहीत); असे सर्व कलियुगांत घडणार आहे.* (दत्तपुराण ८:८:२३-३२) अशा ह्या दारुण कलीच्या काळांत **स्वांशांशजोतयः** स्वांश म्हणजे आपला अंश ब्रह्मदेव, त्याचे अंश मरीचि, कश्यपादि मानसपुत्र, त्यांपासून जन्मलेले इन्द्र, मरुद्गण, वसु, आदित्य इत्यादि **ऊतयः** विभूति म्हणजे देवता माणसाच्या पापामुळे त्यांच्याविषयी तिरस्काराने **दयोना** निर्दय झाल्या **इति** असे जाणून **स्वयं भगवान् दत्तस्तु आविरासीत्** स्वतः भगवान् दत्तांनी अवतार घेतला. ज्याप्रमाणे नोकरचाकरांवर कार्य सोपवलेले असले तरी ते सर्व दमून भागून गेल्यावर एखादे तांतडीचे कार्य उपस्थित झाले असतां स्वतः मालकच काम करूं लागतो आणि त्याला पाहून थकलेले असले तरी ते नोकर आपसुकच कामाला लागतात त्याप्रमाणे. असे न मानल्यास देव विषम (म्हणजे पक्षपाती) आहे असे वाटेल.९.

**स कृष्णामरजातीर-विहारी लोकपावनीः । भिक्ष्वात्मनात्र सल्लीलाः कृत्वाऽदृश्योऽस्ति तत्र हि ।।१०।।**
**ॐकारोच्चारणं जातमात्रेण नयनं तथा । स्वर्णतामयसोऽभ्यासमृतेऽपि ब्रह्मपाठनम् ।।११।।**
**तत्त्वोपदेशनं पित्रोर्बाल्ये तीर्थाटनं तथा । योगाख्यापनसंन्यास-वर्त्मसंस्थापनेऽन्यथा ।।१२।।**

सः कृष्णा+अमरजा+तीर+विहारी भिक्षु+आत्मनः लोक+पावनीः सत्+लीलाः कृत्वा तत्र अदृश्यः अस्ति हि।१०। जातमात्रेण ॐकार+उच्चारणं, तथा अयसः स्वर्णतां नयनं, अभ्यासं ऋते अपि ब्रह्म+पाठनम्।११। पित्रोः तत्त्व+उपदेशनं, तीर्थ+अटनं तथा योग+आख्यापनं+संन्यास+वर्त्म+संस्थापने अन्यथा..।१२।

तो कृष्णा आणि अमरजा यांच्या तीरांवर विहरणारा, संन्यासी रूपानें, लोकांना पावन करणारा मंगल लीला करून तिथे अदृश्य रूपांत आहेच. **स** तो अवतरलेला प्रभु. भिक्षु = संन्यासी. नास्तिकांना अदृश्य असला तरी भक्तांना (तसा) नाही. (म्हणजे भक्तांना आजही दर्शन देतो.) **हि** प्रसिद्ध ह्या अर्थाने.१०. (इथून पुढे आठ श्लोकांत ह्या अवताराचे भगवत्स्वरूप अघटितघटनापटुत्वाद्वारे प्रदर्शिले आहे. यालाच अष्टश्लोकी गुरुचरित्र असेही म्हणतात.) जन्मताच ॐकाराचा उच्चार, लोखंडाचे सोने करणे, अभ्यासाविनाही वेदांचे पठण; **जातमात्रस्य** साधारण नवजात बालकाला श्वास घेण्यालाही प्रयत्नांची आवयकता असते. त्या वेळीच लोकांत प्रसिद्ध असलेले **ॐकारोच्चारणं** ह्याचे ॐकाराचे उच्चारण ह्याच्या ईश्वरत्वाचे गमक आहे. **अयसः स्वर्णतां नयनं** कांही रासायनिक प्रक्रियांनी नव्हे तर केवळ हाताच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने करणे, **अभ्यासमृते** गुरूंजवळ जाऊन अभ्यास न करतांच एकदम **ब्रह्मणो** वेदांचा **पाठनम्** पाठ करणे,११. **पित्रोः** आई-वडिलांना **तत्त्वोपदेशनं** तत्त्वज्ञानाचा उपदेश, **बाल्ये** वयाच्या आठव्या वर्षींच तीर्थयात्रेला जाऊन **योगाख्यापन** योगाचा उपदश करणे तसेच संन्यामार्गाची प्रतिष्ठापना करणे, अन्यथा (पुढील श्लोकांत वाक्य पूर्ण होते).१२.

**कथं भाव्यं द्राग्घरणं प्रतीपाचरणै रुजः । तथाऽवाचोऽपि विद्वत्ता-दानं साग्विप्रदुर्गतेः ।।१३।।**
**हरणं त्रिस्थलीयात्रा-चरणं मृतजीवनम् । वशागोदोहनं विश्व-रूपाविष्करणं यतौ ।।१४।।**
**विद्वद्दर्वापहरणं निन्द्यास्याद्वेदवाचनम्। विश्वस्ताया अवैधव्य-दानं कर्मप्रकाशनम् ।।१५।।**
**जरदेधःपल्लवतां नयनं निष्कलस्त्रियै । सुप्रजस्त्वार्पणं कुष्ठ-हरणं दृष्टिमात्रतः ।।१६।।**

(अन्यथा) कथं भाव्यम्? प्रतीप+आचरणैः रुजः द्राक् हरणं तथा अवाचः अपि विद्वत्ता+दानं, विप्र+दुर्गतेः साग् (हरणं),।१३। हरणंत्रि+स्थली+यात्रा+चरणं, मृत+जीवनं, वशा+गो+दोहनं, यतौ विश्व+रूप+आविष्करणं।१४। विद्वत्+गर्व+अपहरणं, निन्द्य+आस्यात् वेद+वाचनं, विश्वस्ताया अवैधव्य+दानं, कर्मप्रकाशनम्।१५। जरत्+एधः पल्लवतां नयनं, निष्कल+स्त्रियै सु+प्रजस्त्व+अर्पणं, दृष्टिमात्रतः कुष्ठ+हरणम्।१६।

**अन्यथा कथं भाव्यं** श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींच्या साक्षात् ईश्वरस्वरूपाशिवाय दुसऱ्या कोणत्या उपपत्तीने ह्या सर्व चमत्कारांचा उलगडा होऊं शकतो? हे पुढे वर्णिलेल्या सर्व चमत्कारांना लागूं होते.१३. प्रतिकूल आचरणानेच (कुपथ्य करूनच) तात्काळ रोग घालविणे. तसेच जीभ नसलेल्या (ब्राह्मणाला) विद्वत्तेचे दान करणे, विप्राची दुरवस्था (दारिद्र) लगेच घालविणे, निमिषमात्रांत गंगानुजाला त्रिस्थळीची यात्रा घडविणे, ब्राह्मणाच्या मरण पावलेल्या मुलाला जिवंत करणे, वांझ म्हशीचे दोहन करणे; **वशागो** इथे म्हशीला अनुलक्षून आहे; किंवा *वशा अगो* अशी फोड करून गाईव्यतिरिक्त ती म्हैस असाही अर्थ करतां येईल. (त्रिविक्रम भारती) यतीला विश्वरूप दाखविणे,१४. विद्वान् ब्राह्मणांचा गर्व उतरविणे, पतिताच्या मुखाने वेदपठण, आपल्यावर विश्वासलेल्या विधवेला (तिचा मृत पती जिवंत करून) सौभाग्यदान, कर्मकांडाचे प्रकाशन,१५. जीर्ण (औदुंबर) काष्ठाला पालवी आणणे, ऋतुहीन (वृद्ध व वांझ) स्त्रीला उत्तम संतती प्राप्त करून देणे, केवळ दृष्टिक्षेपाने (नंदीचे) कुष्ठ घालविणे,१६.

**क्षणेऽष्टग्रामगमनं छिन्नसस्यविवर्धनम् । इत्यादिकं कृतं दिव्यं करोति च करिष्यति ।।१७।।**
**भपार्थिवरजोऽम्ब्वंश-गणकाः सन्तु कुत्रचित् । भूयोऽगणेयोरुगुण-गुणान्गुणयितुं ह्यलम् ।।१८।।**
**लीलाप्रादुष्कृतगुण-रूपोऽरूपोऽगुणोप्यरम् । श्रवःसृत्या प्रविश्यांतर्भक्तस्याघं धुनोत्यजः ।।१९।।**

क्षणे अष्ट+ग्राम+गमनं, छिन्न+सस्य+विवर्धनम्। इत्यादिकं दिव्यं कृतं, करोति च करिष्यति।१७। भ+पार्थिव+रज+अम्बु+अंश+गणकाः कुत्रचित् सन्तु। भूयः अगणेय उरु+गण+गुणान् गु(ग)णयितुं हि अलम्।१८। अरूपः अगुणः अजः अपि लीला+प्रादुष्कृत+गुण+रूपः श्रवः+सृत्या अंतः प्रविश्य भक्तस्य अघं धुनोति।१९।

(दिवाळीच्या) उत्सवांत (एकाच वेळी) आठ गांवीं जाणे, (अकाळी) कापलेल्या पिकाचे संवर्धन इत्यादि (चमत्कार त्या श्रीगुरूंनी) (पूर्वी) केले, (आजही) करतात व (पुढेही) करणार आहेत. आठ प्रिय भक्तांच्या प्रार्थनेनुसार आठही गांवीं जाऊन त्यांच्यासह दिवाळी साजरी केल्याची कथा पुढे येणार आहे.१७. आकाशांतील तारे, भूमीवरील धुळीचे कण किंवा (समुद्राच्या वा पावसाच्या) पाण्याचे थेंबही मोजणारे कुठे (कुणी कदाचित्) सांपडतील पण अनंतगुणसंपन्न परमेश्वराचे गुण मोजणे (कधीच संपणार नसल्याने) पुरे झाले. इथे *'विष्णोर्नु कं वीर्या..'* (ऋग्वेद सं. १:१५४:१) ह्या वेदवाक्याचा आशयच सुचविलेला आहे. *'वेवेष्टीति विष्णुः'* म्हणजेच सर्वव्यापी भगवंत त्याचे *'वीर्याणि'* पराक्रम (लीला) *'कः प्रवोचत'* कोण वर्णू शकेल? 'नु' खरोखर कुणीच नाही. *'यः पार्थिवानि रजाँसि विममे'* जो पृथ्वीवरील धूलीचे कण(ही कदाचित्) मोजील तोसुद्धां नाही. *'यो विष्णुः त्रेधा विचक्रमाणः'* तीन पावलांनी *'सधस्थं'* तेथील निवासी देवांसह *'उत्तरं लोकं'* पलीकडच्या सत्यलोकाला *'अस्कभायद्'* भिडून *'स्थः'* स्थिरावला आहे. निर्गुण आणि निराकार असूनही केवळ लीलेनेच धारण केलेल्या गुणांच्या रूपाने हा अजन्मा श्रवणेंद्रियांच्या द्वारे भक्तांच्या अंतरांत प्रवेश करून (त्यांची) पापे नष्ट करतो.१९.

**तदेकनिष्ठः पूतात्मा जीवन्मुक्तो भवेत्ततः । निर्द्वन्द्वस्यारब्धभुजो देहः पततु वा न वा ।।२०।।**
(क्षेपकः) **तत्राज्ञानसमुत्पन्न-द्वंद्वाभावः प्रवर्तते । प्रारब्धान्ते स यात्येव कैवल्यं पदमुत्तमम् ।।**
**अयं हि ब्रह्मभूयाप्ति-सत्पथो नाक्षिगोचरः । मोहान्धानामसत्संग-विवेकानां कुसंपदाम् ।।२१।।**

ततः तत्+एक+निष्ठः पूत+आत्मा जीवन्+मुक्तः भवेत्। निर्द्वन्द्वस्य आरब्ध+भुजः देहः पततु वा न वा।२०। तत्र अज्ञान+समुत्पन्नः +द्वंद्व+अभावः प्रवर्तते। सः प्रारब्ध+अन्ते उत्तमं कैवल्यं पदं याति एव।(क्षेपकः।) अयं ब्रह्म+भूय+आप्ति+सत्+पथः अ+सत्+सङ्ग+विवेकानां मोह+अन्धानां कु+संपदां न हि अक्षि+गोचरः।२१।

मग तो एकनिष्ठ भक्त शुद्धचित्त होऊन जिवंतपणीच मुक्त होतो. सुखदुःखादि द्वंद्वांपलीकडे जाऊन प्रारब्धाचा भोग घेतो; मग त्याचा देह पडो वा न पडो. **ततः** पापक्षालन झाल्यावर **तदेकनिष्ठः** भगवत्परायण असल्याने **पूतात्मा** शुद्ध म्हणजेच रागद्वेषादि विकाररहित अंतःकरण झाल्याने अपरोक्ष अनुभूति प्राप्त करून घेऊन **जीवन्मुक्तो भवेत्** जिवंतपणीच मुक्त होतो. **निर्द्वंद्वस्य** भगवद्गीतेत *'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः। वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते'* (२:५६) असे वर्णन केल्याप्रमाणे स्थितप्रज्ञ होऊन **आरब्धभुजः** प्रारब्ध भोग भोगत राहतो. मग **देहः** पडो वा न पडो.२०. तिथे अज्ञानजन्य द्वंद्वाचा अभावच असतो. (असा हा जीवन्मुक्त) प्रारब्ध (भोगून) संपल्यावर श्रेष्ठ असे मोक्षपद पावतो (विदेहमुक्त होतो.) (क्षेपक). मात्र हा ब्रह्मपदप्राप्तीचा सन्मार्ग संतसंगति आणि विवेक यांच्या अभावीं मोहांध झालेल्या, आसुरी संपदेचा आश्रय केलेल्यांच्या डोळ्यांना दिसत नाही.

गरुडपुराणांत सांगितल्याप्रमाणे, 'सत्सङ्गश्च विवेकश्च निर्मलं लोचनद्वयम्। यस्य नाऽस्ति नरः सोऽन्धः कथं न स्यादमार्गगः।।' सत्संग आणि विवेक हे दोन स्वच्छ नेत्र ज्याला नाहीत तो मानव आंधळाच होय. (मग) तो आडवाटेला लागणार नाही का? नाकापासून कानापर्यंत पसरलेले दोन डोळे असलेल्यांना डोळस मानले तरी सूक्ष्म कार्याची पाहणी सत्संग आणि विवेक ह्याच नेत्रद्वयांनी होते. त्यांचा अभाव असणारा आंधळाच होय. म्हणून तो आडवाटेला - म्हणजे दुराचरणाने पशु आदि योनींच्या गतीला जातो (विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे। वासुदेव निर्मल देहे जेणे त्वत्पदिं राहे।।).२१.

**कृतस्ववर्णाश्रमदृष्टकर्मा विद्वान् सदिष्टो गुरुदेवभक्तः ।**
**इहैव भुक्तिं च लभेत मुक्तिं संन्यास्यनेनैव पथा स योगी ।।२२।।**

कृत+स्व+वर्ण+आश्रम+दृष्ट+कर्मा सत्+इष्टः गुरु+देव+भक्तः विद्+वान् सः योगी संन्यासी (च भूत्वा) अनेन एव पथा इह एव भुक्तिं मुक्तिं च लभेत।२२।

आपल्या वर्णाला आणि आश्रमाला उचित असे कर्म केल्याने तो संतांचा लाडका होतो. त्याच कारणाने तो सद्‌गुरू आणि ईश्वर यांचा उपासक होतो. याच मार्गाने तो गीतेच्या वचनानुसार *('अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः। स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः' ।।६:१।।)* विद्वान् म्हणजे ज्ञानी होतो. विहित कर्माचे निष्काम अनुष्ठान केल्याने विविदिषा उत्पन्न होते आणि ईश्वराभिन्न सद्‌गुरूंची भक्ती हीच उपासना केल्याने चित्ताला एकाग्रता येते. तिच्या योगाने वेदांत निर्देशिलेली शमदमादि (*'शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति।'* सुबालोपनिषत् ९:१४) आत्मविद्येची अंतरंग साधने सिद्ध होतात. अशा रीतीने आत्मज्ञानाचा मुख्य अधिकारी झाल्यावर सद्‌गुरूंना शरण जाऊन श्रवणादींनी **विद्वान् सन्** ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुक्तीचा लाभ करून घेतो. तसेच तैत्तिरीय उपनिषदांत (आनंदवल्ली) वर्णन केलेल्या सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंतच्या एकाहून एक शंभरपट आनंदांचा भोगही घेतो. मोक्षाच्या ठायीं कामादिविषयांचा भोग वस्तुतः नसतो. तथापि विषयांनंदांचा समावेश ब्रह्मानंदांत अंशत्वाने असल्याने ब्रह्मानंदाची प्राप्ती झाली की सर्व विषयांचा भोग घेतल्यासारखाच होतो. वेदांतसूत्रांत (*'ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्।'* ३:४:५१) सांगितल्याप्रमाणे (प्रारब्धाचा) प्रतिबंध नसेल तर ह्याच जन्मांत तो मुक्त होतो. अन्यथा प्रतिबंध असेल तर तो जन्मातराने मुक्त होतो.२२.

**एवं सुवृत्तं महिमानमीशितुः श्रुत्वास्य भीमामरजागमे ययौ ।**
**कश्चिद्भवभ्रष्टमनाः स्तुवन्गुरुं तप्तः शरण्यं श्रितकल्पशाखिनम् ।।२३।।**
**गणेशं शारदां नत्वा श्रीगुरुं नामधारकः। द्विजस्तुष्टाव घोरेऽत्र नृधाम्ना विश्रुतं हरिम् ।।२४।।**

एवं अस्य ईशितुः सुवृत्तं महिमानं श्रुत्वा कश्चित् तप्तः भव+भ्रष्ट+मनाः श्रित+कल्प+शाखिनं शरण्यं गुरुं स्तुवन् भीमा+अमरजा+गमे ययौ।२३। नामधारकः द्विजः गणेशं शारदां श्रीगुरुं नत्वा अत्र घोरे नृ+धाम्ना विश्रुतं हरिं तुष्टाव।२४।

ह्या पहिल्या २२ लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी द्विसाहस्री या आपल्या गुरुचरित्राच्या अनुवादात्मक ग्रंथाचा उपोद्घात केला आहे. मंगलाचरण, चरित्रनायक, ग्रंथाचा विषय, अधिकारी, सूत्ररूप चरित्र, भगवद्गुणांच्या श्रवणकीर्तनाचे माहात्म्य इत्यादि विषय यांत आले आहेत. आतां पुढील लोकापासून मूळ श्रीगुरुचरित्राचा उपोद्घात उर्वरित अध्यायांत अनुवादला आहे. असे हे भगवान दत्तात्रेयांचे शुभ वर्तमान व माहात्म्य ऐकून (आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक अशा त्रिविध तापांनी) पोळलेला आणि त्यामुळेच संसाराला विटलेला विरक्त असा कोणी एक ब्राह्मण श्रीगुरूंची स्तुती करीत भीमामरजा संगमावर लीलेने निवास करणाऱ्या, लोकांना मात्र पादुकारूपानेच दिसणाऱ्या, स्वभक्तांचा कल्पवृक्ष आणि म्हणूनच शरण जाण्याला योग्य अशा भगवंताकडे गेला.२३. त्या नामधारक नांवाच्या ब्राह्मणाने श्रीगणेश आणि शारदा यांना वंदन करून या घोर कलियुगांत मनुष्यरूपाने (अवतरलेल्या) सुप्रसिद्ध दैन्य, दुःख, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. सरस्वतीपंत ह्या नांवाने प्रसिद्ध आणि श्रीगंगाधरांचा पुत्र असणाऱ्या त्या ब्राह्मणाने आपल्या अभिमानाच्या परिहारासाठी नामधारक हे कल्पित नांव घेतले. ऐतरेय आरण्यकांत (*'तस्य वाक्तन्तिर्नामानि दामानि तस्येदं वाचातन्त्या नामभिर्दामभिः सर्वं सितम्।'* २:१:६) म्हटल्याप्रमाणे नाम हे दाम म्हणजे बंधन आहे. श्रीदत्तप्रभूंच्या साक्षात् दर्शनाच्या इच्छेने त्यांना स्तुतीने प्रसन्न करण्यासाठी, प्रथम निर्विघ्नसिद्धीसाठी गणेशादींना वंदन करून ह्या घोर कलियुगांत नरहरि नांव धारण केलेल्या दत्तात्रेयांचे स्तवन करूं लागला.२४.

**सर्वज्ञ मां न जानीषे विश्वसाक्षिन्न चेक्षसे । विलापो न श्रुतो विष्णो मम श्रुत्वाप्युपेक्षसे ।।२५।।**
**चेज्ज्ञातेऽत्र क्व वैक्लव्यं कथं दैन्यं त्वयेक्षिते । श्रुते चेच्छुक्कुतोऽप्यर्हा त्वय्युपेक्षा दयानिधे ।।२६।।**
**सर्वदेवेश्वरोऽपि त्वं त्वं नोऽपि कुलदैवतम् । त्वां हित्वा कतमं याचे वेद्मीशन्त्वापि वेत्सि माम् ।।२७।।**

(हे) सर्वज्ञ (अपि) मां न जानीषे? (हे) विश्व+साक्षिन् न च ईक्षसे? (हे) विष्णो मम विलापः न श्रुतः? श्रुत्वा अपि उपक्षसे (किम्)।२५। चेत् ज्ञाते अत्र क्व वैक्लव्यम्? त्वया ईक्षिते कथं दैन्यम्? श्रुते चेत् कुतः शुक्? (हे) दया+निधे त्वयि उपेक्षा अर्हा अपि?।२६। त्वं सर्व+देव+ईश्वरः अपि, त्वं नः कुल+दैवतं अपि। (हे) ईश, त्वां हित्वा कतमं याचे? त्वां वेद्मि (त्वं) अपि मां वेत्सि।२७।

हे सर्वज्ञा, तूं मला ओळखत नाहीस (का?) हे विश्वसाक्षी देवा, तू मला पाहत नाहीस (का?) हे व्यापनशीला माझा शोक तू ऐकत नाहीस (का?) कीं तू ऐकूनसुद्धा उपेक्षा करतो आहेस? मुण्डकोपनिषदानुसार (*'यः सर्वज्ञः सर्ववित्।'* १:१:९) हे सर्वज्ञा, मला ओळखत नाहीस का? इथे **अपि** प्रश्नार्थक आहे. (अमरकोश ३:३:२४९). विशेषणांची योजना हेतुगर्भ आहे. सर्वज्ञ असूनही मला कसा जाणत नाहीस? विश्वसाक्षी असून मीच कसा दिसत नाही? सर्वव्यापी असूनही माझा विलाप ऐकत नाहीस? असा भावार्थ.२५. देवाला उद्देशून योजलेली सर्वही संबोधने अन्वर्थक असूनही विपरीत अनुभव का येतो आहे हे या श्लोकांत विचारले आहे. जर तू मला ओळखतोस तर मग मी असा विह्वळ का? जर तू (माझ्याकडे) पाहत असशील तर माझे दैन्य कसे आहे? (माझा विलाप) तुझ्या कानांवर पडूनही (माझा) शोक (अजूनही) कसा राहिला? हे दयासागरा, तुला ही उपेक्षा शोभते का? अर्थात् मुळीच नाही!२६. 'अरे कार्याला उशीर लागतो. उशीर सहन होत नसेल तर आणखी कुठल्या तरी देवाकडे जा.' असे म्हणाल तर आपल्यासारखा दुसरा (समर्थ) कोणी नाही हे सांगतात. आपणच सर्व देवांचे अधिदेव आहां. आमचे कुलदैवत आहां. आपल्याला सोडून कुणाकडे (कोणत्या इतर देवाकडे) याचना करूं? 'कशावरून?' म्हणाल तर मी आपल्याला सर्व देवांचा देव म्हणून शब्दप्रमाणाने जाणतो. कारण आपणच गीतेत *'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः'* (१५:१५) असे सांगितले आहे. आपण तर मला भक्ताला प्रत्यक्षच जाणतां.२७.

**सर्वोऽपि वेत्ति भूपं न भूपः सर्वन्तथोचितम् । अज्ञे तु त्वयि सर्वज्ञे कथं श्लाघ्यमिदं प्रभो ।।२८।।**
**नासेवकायादात्रेऽपि चेद्दास्यस्युचितं न तत् । सेवेच्छुः श्रीश किं दाता तद्वत्प्रत्युपकार्यपि ।।२९।।**
**ज्योतिर्द्योतमिहाब्दोम्बु सेवोनेऽर्पयति ध्रुवे । पदं बिभीषणेऽदात्रोर्दत्तं मे देह्यतः प्रियम् ।।३०।।**

सर्वाः अपि भूपं वेत्ति, न भूपः सर्वम्। तथा तु अज्ञे(भूपे) उचितम्। (हे) प्रभो त्वयि सर्वज्ञे इदं कथं श्लाघ्यम्?।२८। असेवकाय अदात्रे अपि न दास्यसि इति चेत् न तत् उचितम्। (हे) श्री+ईश, सेवा+इच्छुः तत् वत् प्रति+उपकारी अपि दाता किम्?।२९। इह ज्योतिः द्योतं, अब्दः अम्बु, सेवा+ऊने अर्पयति। अदात्रोः ध्रुवे, बिभीषणे (च) पदं दत्तम्। अतः मम प्रियं देहि।३०।

'राजाला सगळे ओळखतात पण राजा सर्वांना (विशेषतः) ओळखत नाही; तसेच हे आहे' असे आपण म्हणाल तर अल्पज्ञ राजाच्या बाबतीत हे कदाचित् योग्य ठरेल पण आपण तर सर्वज्ञ आहांत. आपल्याला हे कसे शोभेल?२८. ते असो! सेवा न करणाऱ्याला व (कांही) न देणाऱ्याला आपण देत नाही असे म्हणणेही आपल्याला योग्य नाही. आपण श्री म्हणजे अव्याहत ऐश्वर्याचे धनी आहांत. या विशेषणाने दान देण्याची क्षमता आणि औदार्य आपल्या ठिकाणी आहे हे सुचविले आहे. सेवेची अपेक्षा करणाऱ्याला दाता म्हणतां येईल का? किंवा सेवेच्या अपेक्षेने दान करणारा *किंदाता* निकृष्ट दाता ठरेल. तेच प्रत्युपकारकर्त्याविषयीही म्हणता येईल. सीतेच्या शोधानंतर हनुमंताला श्रीरामप्रभु म्हणतात 'हे वानरश्रेष्ठ! तुझा हा उपकार माझ्यांतच जिरून जावो. प्रत्युपकाराची अपेक्षा करणारा माणूस उपकारकर्त्यावर विपत्ति येण्याची इच्छा करतो.' (*'मय्येव जीर्णतां यातु उपकारो हरे तव। नरः प्रत्युपकारार्थी विपत्तिमभिवाञ्छति।।'* उत्तरकांड ४०:२४).२९. 'तरी अशा प्रकारचे दान कुठे पाहिलंस का?' असा प्रश्न अपेक्षून म्हणतात. इथे (इहलोकी) सूर्यचंद्राग्निरूप ज्योति प्रकाशाचे, तसेच मेघ पाण्याचे दान, सेवा न करणाऱ्याही सर्व लोकांना देतात. आपल्याला कांहींच न दिलेल्या ध्रुव आणि बिभीषण या दोघांना अढळपद आणि राज्य आपणच दिले आहे. तरी मला माझे प्रिय असे तुझे दर्शन दे.३०.

**निधयस्तेऽनुगा दास्यः सिद्धयः श्रीस्तु किङ्करी । तत्ते किं भगवन्देयं किं कार्यं परिपूर्ण ते ॥३१॥**
**स्वसेवककुलं भूमौ पालयन्ति नृपा अपि । कुतो मोपेक्षसे दीनं मत्पूर्वार्चित विश्वभृत् ॥३२॥**
**देवेश मेऽपराधैश्चेदायास्यन्तर्विषादताम् । पत्ताडितार्भकैः किं नु प्रसू रुष्यति मानुषी ॥३३॥**

(हे) भगवन्, निधयः ते अनुगाः, सिद्धयः दास्यः, श्रीः तु किङ्करी। तत् (हे) परिपूर्ण ते किं देयम्? ते किं कार्यम्?।३१। भूमौ नृपाः अपि स्व+सेवक+कुलं पालयन्ति। (हे) विश्व+भृत्, मत्+पूर्व+अर्चित कुतः मां दीनं उपेक्षसे?।३२। (हे) देव+ईश, चेत् मे अपराधैः विषादतां आयास्यन्तः, मानुषी (अपि) प्रसू पत्+ताडित+अर्भकैः रुष्यति किम्?।३३।

'त्या वेळी दिले. आतां थोडे घेऊन देतो' असे म्हणाल तर निधि आपले अनुचर आहेत, सिद्धी आपल्या दासी आहेत, साक्षात् लक्ष्मी आपल्या चरणाची सेवा करते, आपल्याला काय देतां येईल? अर्थात् कांहीच नाही. किंवा आपण नित्यच परिपूर्ण असल्याने आपले कांही कार्यही करतां येणार नाही.३१. याउप्परही आपण अपेक्षा करीत असाल तर असे पहा, ह्या भूलोकांत मनुष्यांतील राजेसुद्धा आपल्या नोकरांच्या वंशजांचे पालन करतात ना? माझ्या वाडवडिलांनी पूजलेल्या देवा, मज दीनाची का उपेक्षा करतोस? इथे मी जरी सेवा केली नसली तरी माझ्या पूर्वजांच्या सेवेचा विचार करून माझी उपेक्षा करूं नका असे सुचविले आहे. **विश्वभृत्** विश्वाच्या पोशिंद्या, असे संबोधन योजून माझा विश्वांतच अंतर्भाव असल्याने माझ्या भरणपोषणाची जबाबदारी आपलीच आहे असे म्हणायचे आहे. नाही तर मला विश्वाच्या बाहेर करावे लागेल असा भाव आहे.३२. किंवा हे देवाधिदेवा, माझ्या अपराधांनी आपल्याला राग आला असे म्हणावे तर गर्भांत किंवा मांडीवर असलेल्या लेंकराने लाथा मारल्या तरी मानवी माता रागावते का? मुळीच नाही! मग देवांचेही देव असलेल्या आपल्याला असा रोष शोभत नाही.३३.

**जीवनं पितरौ यत्र भिन्नावन्यतराच्छिशोः । त्वं तूभयं मे किं कार्यं निर्घृणे विश्वभृत्त्वयि ।।३४।।**
**साहसं कुरु मेत्युक्त्वा यथा दारु भिनत्ति विः । तथा साहजिकैर्दोषैर्निन्दाम्यंहः करोम्यहम् ।।३५।।**

यत्र पितरौ भिन्नौ अन्यतरात् शिशोः जीवनम्। मे तु त्वं उभयम्। (हे) विश्वभृत्, त्वयि निर्घृणे किं कार्यम्?।३४। 'साहसं मा कुरु' इति उक्त्वा यथा विः दारु भिनत्ति तथा साहजिकैः दोषैः अहं निन्दामि, अहः करोमि।३५।

तसे तर (वेदांतदृष्ट्या) या जगताचे उपादान कारण आणि निमित्त कारणही तुझ्याकडेच येते; (कारण तूच हे विश्व स्वतःपासूनच निर्माण केले आहे. *'स ईक्षत लोकान्नु सृजा'* इत्यादिना तुझे निमित्तत्व, तर *'तदाऽऽत्मानँ स्वयमकुरुत्'* या वाक्याने उपादानतत्व, सिद्ध होते. अशा रीतीने तुझे अभिन्न निमित्तोपादानत्व वेदप्रामाणित आहचे. पण लौकिक अथवा सांख्य दृष्ट्या जरी विचार केला तर बालकाचे (वेदांत न जाणणाऱ्या जीवाचे) माता आणि पिता दोघे निरनिराळे असल्याने शिशूची उपजीविका त्यांच्यापैकी एकाकडूनही होऊं शकते. (इथे **पितरौ** ह्याचा अर्थ एकशेष द्वंद्व समासानुसार माता आणि पिता असा होतो.) तू तर सर्वेश्वर असल्याने, उपनिषदांवर विश्वासलेल्या मला दोन्ही - माता आणि पिता, आहेस. आपणच गीतेत (९:१७) 'मीच या जगाचा पिता, माता, पालनकर्ता आणि पितामहसुद्धा आहे.' असे म्हटले आहे. तरी हे विश्वपालका, आपणच असे कठोर झाल्यावर (निदान तसे मला भासत असतां) मी काय बरे करावे?३४. 'मग हे अपराधरूपी पाप तू करतोसच का?' असे विचारशील तर ते माझ्या सहज (प्राकृतिक) दोषाने घडते आहे हे दृष्टांतासह स्पष्ट करतात. कोणी एक पक्षी 'साहस करू नये' असे म्हणत असतांनाच स्वतःच लाकूड पोखरत असतो. तद्वत्च मी माझ्या साहजिक दोषांनीच हे आपली निंदारूपी पाप करतो आहे.३५.

**आघे पुण्यवतः प्रोक्तं प्रायश्चित्तमवेक्ष्य माम् । आरात्पलायते भीत्या शार्दूलमिव शृङ्गिणी ।।३६।।**

**मालिन्यदोषभीत्या तु माषराशेः पृथक्किमु । कार्यं जपो मदङ्गाघात्किं करोति पृथग्घरे ।।३७।।**

**मादृक्पापो हरे नास्ति भवादृङ् नास्ति पापहा । पाह्यनन्याश्रयं दीनं त्यक्त्वौदासीन्यमीश माम् ।।३८।।**

पुण्यवतः आघे प्रोक्तं प्रायश्चित्तं मां अवेक्ष्य, शार्दूलं शृङ्गिणी इव आरात् पलायते।३६। मालिन्य+दोष+भीत्या तु माष+राशेः किं पृथक् कार्यम्? (हे) हरे, मत्+अङ्ग+अघात् जपः किं पृथक् करोति?।३७। (हे) हरे, मादृक् पापः न अस्ति, भवादृक् पापहा न अस्ति। औदासीन्यं त्यक्त्वा मां दीनं अन्+अन्य+आश्रयं पाहि।३८।

'अरे मग प्रायश्चित्त कर!' असे म्हणशील तर *'विध्यपराधे प्रायश्चित्तम्'* ह्या श्रौतसूत्रानुसार पुण्यवान माणसाने थोडेफार पाप केले तर त्याचा दोष परिहार करण्यासाठी ऋषिमुनींनी जे प्रायचित्त सांगितले आहे ते माझ्यासारख्या महापाप्याला पाहून, सिंहाला पाहून धावणाऱ्या गाईसारखी, लांबूनच पळून जातात.३६. जपादींनी पापाचा परिहार करायला आपण सांगाल तर मलिनतेच्या भयाने माझ्या देहांतून पाप वेगळे करणे हे उडदाच्या राशींतून काळेपणा दूर करण्यासारखे दुरापास्त आहे. जप तेथे काय करील? हे हरी अशा संबोधनाने *'नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी जन'* ह्या स्कंदपुराणांतील वचनानुसार (वैष्णवखंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३) परमेश्वराच्या नांवांत ही शक्ती आहे असेच सुचविले आहे.३७. हे हरी माझ्यासारखा पापी नाही आणि आपल्यासारखा पाप घालविणारा नाही. अशा रीतीने दुसरा कांहीही आधार नसलेल्या मला दीनाला, हे ईश्वरा, आपली उदासीनता सोडून माझे रक्षण करा.३८.

**द्रवन्त्यपि शिलाः श्रुत्वा मद्विलापं दयानिधे । कारुण्यं ते कुतो यातं म्रियमाणं न वेत्सि यत् ।।३९।।**
**एवं विलाप्य मार्गेऽसौ गुरुध्यानैकतानहृत् । तस्थौ प्रायोपवेशेन दैवात्स्वप्नस्तदाभवत् ।।४०।।**
**धेनुर्वत्सं यथोपैति भगवान्भक्तवत्सलः । प्राप्यावधूतवेषेण स्वप्नेऽमुं पर्यतोषयत् ।।४१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते चरितानुसंधानं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

(हे) दयानिधे मत्+विलापं श्रुत्वा शिलाः अपि द्रवन्ति। (हे) करुणा+निधे ते कारुण्यं कुतः यातं, यत् म्रियमाणं न वेत्सि?।३९। एवं असौ मार्गे विलाप्य गुरु+ध्यान+एकतान+हृत् प्रायोपवेशनेन तस्थौ। तदा दैवात् स्वप्नः अभवत्।४०। यथा धेनुः वत्सं उपैति (तथा) भक्तवत्सलः भगवान् अवधूत+वेषेण प्राप्य अमुं स्वप्ने पर्यतोषयत्।४१।

'मी कुठे औदासीन्य धारण केले आहे?' असा प्रश्न अपेक्षून पुढे सांगतात. हे दयासागरा, हृदयशून्य अशा पाषाणांनासुद्धां पाझर फोडणारा माझा शोक ऐकूनसुद्धा आपल्यावर त्याचा कांहीच परिणाम दिसत नाही आणि मरणासन्न अशा माझ्याकडे आपण लक्ष देत नाही. आपलें कारुण्य कुठे हो गेले?३९. अशा प्रकारे हा नामधारक शोक करीत वाटेमध्ये गुरुप्राप्तीचा उपाय म्हणून अनन्य चित्ताने गुरुचिंतनांत मग्न होऊन प्रायोपवेशन करीत राहिला. *'संन्यासवत्यनशने पुमान् प्रायः'* ह्या अमरकोशांत सांगितलेल्या लक्षणाप्रमाणे (२:७:५२) सर्वसंगपरित्याग करून आमरण उपोषणाला बसला. त्या वेळी ध्याननिष्ठ असूनही चित्तांत लय म्हणजे निद्रेचा प्रादुर्भाव करणाऱ्या प्राक्तनयोगाने, जागेपणीही सत्याची प्रचीती देणारे स्वप्न झाले. मिथ्या स्वप्नदर्शनांतूनही सत्याची प्रचीती होऊं शकते याला प्रमाण म्हणून भगवत्पूज्यपादाचार्यांच्या शतश्लोकींतील (३८) वचन उद्धृत केले आहे. *'स्वाप्नादेव प्रसादादभिलषितफलं*

*सत्यतां प्रातरेति। सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति..'.*४०. नवप्रसूत गाय (भगवंताचे वात्सल्य प्रकट करणारा हा दृष्टांत आहे) जशी वासराकडे (धांवून) जाते त्याप्रमाणेच भक्तवत्सल भगवंतांनी अवधूतवेषाने स्वप्नांत येऊन ह्या नामधारकाचे समाधान केले.४१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील पहिला अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ज्ञानयोगः।

### ।। अथ द्वितीयोऽध्यायः ।।

**तत उत्थाय नालोक्य स्वप्ने दृष्टं द्विजोभितः । ध्यात्वा व्रजन्ददर्शाग्रे दयार्द्रं योगिनं समम् ।।१।।**
**अभिवाद्य स तं हर्ष-पुलकोद्गमशोभितः । प्रेमगद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे ।।२।।**
**माता पितोपदेष्टा भी-हर्ता भर्तापि मे भवान् । क्वायातोऽस्ति कुतो गन्ता दिष्ट्या मेऽद्याक्षिगोचरः ।।३।।**

तत उत्थाय द्विजः स्वप्ने दृष्टं अभितः न आलोक्य ध्यात्वा व्रजन् अग्रे दयार्द्रं समं योगिनं ददर्श।१। सः पुलक+उद्गम+शोभितः तं अभिवाद्य प्रेम+गद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे।२। भवान् मे माता, पिता, उपदेष्टा, भी+हर्ता अपि। क्व आयातः असि? कुतो गन्ता? अद्य दिष्ट्या मे अक्षि+गोचरः।३।

**द्वितीयाध्यायी ब्रह्मोक्त गुरुशिष्यकथा । सांगे सिद्ध नामधारका भक्ति दृढ करावया ।।१।।**

तेव्हां, स्वप्नानंतर उठून, स्वप्नांत पाहिलेला तो पुरुष आतां न दिसल्याने तो ब्राह्मण त्या पुरुषाला मनांत आठवीत आसपास धुंडाळून जातां समोरच दयार्द्र शत्रुमित्रभावरहित असा स्वप्नांत पाहिलेला योगी त्याला दिसला.१. नामधारकाने त्या योगी पुरुषाला अभिवादन केले आणि आनंदाने पुलकित होऊन प्रेमाने गहिंवरलेल्या वाचेने बोलण्यास आरंभ केला.२. साधारणतः सर्वांना माता, पिता, गुरू इत्यादि उपकारकर्ते असतात. माझ्यासाठी मात्र परमानंद देणारे आपणच हे सर्व आहांत. अथवा ‘आम्हांला अविद्येच्या पलीकडे तारून नेणारा तूंच आमचा पिता आहेस’ या श्रुतीने (प्रश्न उ. ६.८) सांगितल्याप्रमाणे अध्यात्मज्ञान देण्यास समर्थ असे आपणच मला मातादिक आहांत. तसेच ज्ञानी पुरुष ईश्वराशी एकरूपच असल्याने *‘पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः’* या गीतावचनाप्रमाणे (९:१६) आपणच सर्व विश्वाचेच मातापिता आहांत. महाराज, आपण कुठून आलां आहांत व कुठे जात आहां? (उलटसुलट अव्ययाची योजना नामधारकाच्या संभ्रमाने झाली आहे.) माझ्या सुदैवाने आज आपण माझ्या दृष्टीस पडलां आहांत.३.

**कालेऽनुकूले प्रतीपे ना स्वैः सद्भिश्च युज्यते । निःसंगस्य मुमूर्षोर्मे सर्व एवाद्य वै भवान् ।।४।।**
**नामधारकशर्माहं विप्रस्तप्तोऽत्र सद्गुरुम् । द्रष्टुकामोऽयने क्लेशान्मुमूर्षुरभवं प्रभो ।।५।।**
**इन्द्रियोच्छोषणं शोकं कोऽपि हर्तुं न मे प्रभुः । जाने त्वमेव शक्नोषि हृष्टं दृष्ट्यैव हृद्धि मे ।।६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**योगिध्येयस्त्रिमूर्त्यात्मा यद्भक्ता भुक्तिमुक्तिगाः । योऽस्ति भीमातटेऽसौ तच्छिष्यः सिद्धो धराचरः ।।७।।**

अनुकूले, प्रतीपे काले स्वैः, सद्भिः च युज्यते। मे निःसङ्गस्य मुमूर्षोः भवान् एव सर्व वै।४। (हे) प्रभो, अहं नामधारक+शर्मा विप्रः तप्तः अत्र सद्गुरुं द्रष्टु+कामः अयने क्लेशात् मुमुर्षुः अभवम्।५। मे इन्द्रिय+उच्छोषणं शोकं हर्तुं कः अपि न प्रभुः। जाने त्वं एव शक्नः असि (यतः) दृष्ट्या एव मे हृत् हृष्टं हि।६। सिद्ध उवाच। योगि+ध्येयः त्रि+मूर्ति+आत्मा यत्+भक्ताः भुक्ति+मुक्ति+गाः, यः भीमा+तटे अस्ति, असौ तत्+शिष्यः धरा+चरः सिद्धः।७।

**ना** म्हणजे पुरुषाला अर्थादिकांची अनुकूलता असतांना आपल्या सख्यासोयऱ्यांची सोबत असते. प्रतिकूल काळीं मात्र (सखेसोयरे दुरावल्याने) संतांचाच आश्रय असतो. स्त्रीपुत्रादिकांपासून वियुक्त होऊन मरणोन्मुख झालेल्या माझे खरोखर आपणच सर्व कांही आहांत.४. नामधारक नांवाचा मी ब्राह्मण आहे आणि सदुगुरूंच्या दर्शनाला निघालो असतां मार्गांत झालेल्या कष्टांनी मी मरायला टेकलो आहे. इथे शर्मा शब्दांत ब्राह्मण जातीचा उल्लेख असूनही पुन्हां विप्र शब्दाची योजना नामधारकाचे वेदाध्ययन झाले आहे हे सुचविण्यासाठी केली आहे.५. माझ्या सर्व इंद्रियांचे शोषण करणाऱ्या ह्या शोकाचा परिहार करण्यास कुणीच समर्थ नाही. आपणच ते करूं शकाल असे जाणवते; कारण आपल्या दर्शनानेच माझ्या मनाला हर्ष झाला आहे.६. सिद्धमुनी उत्तर देतात. 'योगी ज्याचे ध्यान करतात, ज्याचे भक्त ऐहिक सुख तसेच मोक्ष पावतात अशा ह्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तिस्वरूप किंवा सत्-चित्-आनंदस्वरूप असलेल्या, भीमातीरी वास करणाऱ्या (श्रीदत्तप्रभूंचा) सिद्ध नांवाचा मी शिष्य असून ह्या पृथ्वीवर (योगबलाने अव्याहत, स्वैर गतीने) संचार करतो. तिसऱ्या श्लोकांत 'कुठून आलांत व कुठे जातां' असा प्रश्न विचारला त्याचे हे उत्तर आहे.'७.

॥ नामधारक उवाच ॥

**सद्गुरुः सोऽपि भगवानस्माकं कुलदैवतम् । श्रद्धाभक्त्या भजे तं मां कष्टाब्धौ मज्जयत्यहो ॥८॥**

॥ सिद्ध उवाच ॥

**स सद्गुरुस्त्रिमूर्त्यात्मा रुष्टेष्वन्येष्वयं प्रभुः । कोऽपि नास्मिन्लौकिकेऽपि नेष्टोऽस्यासीति भाति मे ॥९॥**
**संशयात्माऽश्रद्दधानः क्वापि कैर्नैव गोप्यते । त्रय्यात्मश्रीगुरुस्त्यक्त-संशयात्मेश्वरोऽत्र कः ॥१०॥**

नामधारक उवाच। सः सद्गुरुः भगवान् अस्माकं अपि कुल+दैवतम्। तं श्रद्धा+भक्त्या भजे। अहो कष्ट+अब्धौ मज्जयति।८। सिद्ध उवाच। सः सद्गुरुः त्रि+मूर्ति+आत्मा अन्येषु रुष्टेषु अयं प्रभुः। अस्मिन् (रुष्टे) कः अपि (प्रभुः) न, लौकिके अपि (रुष्टे कः अपि प्रभुः न।) (त्वं तस्य) इष्टः न असि इति मे भाति।९। अश्रद्दधानः संशय+आत्मा क्वः अपि कैः न एव गोप्यते। त्रयि+आत्म+श्रीगुरु+त्यक्त+संशय+आत्मा+ईश्वरः कः।१०।

तोच सद्‌गुरू भगवान् दत्त आमचे कुलदैवत आहे. अहो, श्रद्धेने व भक्तीने आम्ही त्याला भजत असूनही (तो मात्र) आम्हांला दुःखसागरांत लोटून देत आहे.८. सिद्धमुनी म्हणतात, अन्य कोणा ब्रह्मादिकांचा रोष झाला असतां हा त्रयमूर्ति सद्‌गुरू आपल्या भक्तांचे रक्षण करण्यास समर्थ आहे. परंतु ह्यांचाच नव्हे तर अगदी लौकिक गुरूंचाही रोष झाला तर कुणीच रक्षण करूं शकत नाही. मला वाटते तू ह्या सद्‌गुरूंच्या कृपेला पात्र नसावास.९. हा आत्मा स्थूलदेहरूप आहे, की सूक्ष्मदेहरूप अथवा ह्या दोन्हीहून वेगळा? वेगळा असेल तर अणूच्या आकाराचा आहे की मध्यम आकाराचा आहे की सर्वगत आहे? जड आहे, द्रव्यबोधात्मक आहे की चिद्रूप आहे? हा ईश्वरच आहे की ईश्वराहून भिन्न आहे? प्रपंच सत्य आहे की मिथ्या? मोक्षाचे साधन कर्म आहे, की योग आहे की ज्ञान आहे? अशा बुद्धिजन्य, संसर्गजन्य आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनाने उत्पन्न झालेले संशय ज्याच्या चित्तांत घर करून राहिलेले आहेत. त्यांतही वेदांतवाक्यावर श्रद्धा नसलेल्या संशयग्रस्त पुरुषाचे रक्षण कुणीही कुठेही करूं शकणार नाही. त्रिमूर्त्यात्मक सद्‌गुरूंनी टाकलेल्या ह्या संशयात्म्यावर कोण अनुग्रह करील? अर्थात् कुणीच नाही.१०.

**।। नामधारक उवाच ।।**

**रुष्टेऽपि लौकिके नेशःकोऽपीत्युक्तं वदस्व चेत् । प्राग्वृत्तं चैष त्रय्यात्मा कथं मे छिन्धि संशयम् ।।११।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**पुरा निराशिषोऽप्येको बहुस्यामित्यभून्मतिः । या योगनिद्रितस्यैषा विष्णोर्मायाऽनया जगत् ।।१२।।**
**सृष्टं प्राङ्नाभिकमलादभवच्चतुराननः । ददौ तस्मै विनीताय वेदांस्तैरसृजज्जगत् ।।१३।।**

नामधारक उवाच। लौकिके अपि रुष्टे न कः अपि ईशः इति उक्तम्। प्राक्+वृत्तं चेत् वदस्व। कथं त्रयि+आत्मा च। संशयं छिन्धि।११। सिद्ध उवाच। पुरा निः+आशिषः एकः अपि योग+निद्रितस्य विष्णोः या मतिः अभूत् एषा माया। अनया जगत् सृष्टम्। प्राक् नाभि+कमलात् चतुः+आननः अभवत्। तस्मै विनीताय (विष्णुः) वेदान् ददौ। (सः) तैः जगत् असृजत्।१२-१३।

नामधारक विचारतो. महाराज! 'लौकिक गुरूचाही जर रोष झाला तरीही त्यापासून सोडवणारा कुणी नाही' असे जे आपण बोललांत त्याचा कांही पूर्वेतिहास असला तर सांगावा. तसेच हा दत्त त्रयमूर्ति कसा आहे हा माझा संशयही आपण फेडावा.११. सिद्धमुनी उत्तर देतात. पूर्वी - म्हणजे नैमित्तिक कल्पाच्या काळी, निरिच्छ अशा परमात्म्याला आपण एकच आहो ते बहुरूप व्हावे अशी बुद्धी झाली. ते का? या प्रश्नाचे उत्तर देतात की नैमित्तिक प्रलयाच्या वेळी सर्व प्रणिमात्रांच्या वासना परमेश्वराच्या ठायीं लीन झाल्या तीच योगनिद्रा. ह्या योगनिद्रा धारण केलेल्या व्यापनशील परमात्म्याला त्या सर्व प्राणिमात्रांच्या फलोन्मुख झालेल्या कर्मांमुळे आपण अनेक रूपे घ्यावीत अशी मतिरूप इच्छा झाली (ऋग्वेद १०:१२९:३-४). इच्छा, ज्ञान आणि क्रिया शक्तिरूप अशा ह्या विष्णूची ही मिथ्यारूप असली तरीही कार्यावरून तिचे अनुमान करतां येते. अशा मिथ्या असूनही भावरूप (सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय) म्हणविलेली माया भगवंताच्या दृष्टिमात्राने उद्दीपित झाली आणि ती सचेतन झाल्यासारखी भासली. तिच्या द्वारे जगताची उत्पत्ति केली. (पुढच्या श्लोकांतील **सृष्टं** हा शब्द जोडून.) वास्तविक उत्पत्ति-स्थिति-लय ही मायेची कार्ये असूनही विष्णुस्वरूप ब्रह्माला कल्पनेने दिलेले कारणत्व आहे. *'जन्माद्यस्य यतोऽन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (१:१:२) हे ब्रह्माचे तटस्थलक्षण आहे.११.

**कृतं त्रेतां द्वापरं च सधर्मं व्यसृजत्कलिम् । वर्णाश्रमविभागेन मनुष्यस्थितिहेतवे ।।१४।।**
**वैराग्यज्ञानवान्सत्यः सत्यवाग्यज्ञसूत्रभृत् । यज्ञसंभारधृक्त्रेता द्वापरस्तु सुशस्त्रभृत् ।।१५।।**
**पुण्यपापोग्रताशान्ति-दयानैष्ठुर्यसंयुतः । कलिस्तु लिङ्गजिह्वाभृत्कच्चरोऽसन्पिशाचवत् ।।१६।।**

(सः) मनुष्य+स्थिति+हेतवे वर्ण+आश्रम+विभागेन कृतं, त्रेतां, द्वापरं च कलिं स+धर्मं व्यसृजत्।१४। सत्यः वैराग्य+ज्ञानवान् सत्य+वाक् यज्ञ+सूत्र+भृत्। त्रेता यज्ञ+संभार+धृक्, द्वापरः तु सु+शस्त्र+भृत् पुण्य+पाप+उग्रता+शान्ति+दया+नैष्ठुर्य+संयुतः। कलिः तु लिङ्ग+जिह्वा+भृत् कच्चरः असन् पिशाचवत्।१५-१६।

मग सृष्टीची प्रक्रिया सांगतात. प्रथम (श्रीविष्णूंच्या) नाभिकमलांतून चतुर्मुख ब्रह्मदेवांचा उद्भव झाला. विनीत अशा त्या ब्रह्मदेवाला (भगवंतांनी) वेद दिले. (ब्रह्मदेवांनी) त्या वेदांच्या आधारे *'धाता यथापूर्वमकल्पयत्'* या श्रुतिवचनानुसार (ऋग्वेद १०:१९०:३) जगताची निर्मिति केली. भगवंतांनी त्याला वेद दिले यावरून हे स्पष्ट होते की *'शास्त्रयोनित्वात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:१:३) प्रतिपादिल्याप्रमाणे अनादि विष्णूच वेदांचे कर्ते आहेत. इतर कुणी अर्वाचीन नव्हेत.१२. वैराग्य, ध्यान इत्यादि धर्मांनी युक्त कृतयुग, यजनादिधर्मांनी युक्त त्रेतायुग, अर्चनादि धर्माने युक्त द्वापार आणि कीर्तनधर्माने युक्त कलि अशा चार युगांची उत्पत्ती करून मानवाच्या उत्कर्षासाठी ब्राह्मण, क्षत्रिय, वैय आणि शूद्र अशा चार वर्णांची तसेच ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांची विभागणी केली.१४. सत्य(कृत)युग वैराग्य आणि ज्ञान यांनी युक्त, सत्यभाषी आणि यज्ञोपवीत धारण करणारे आहे. म्हणजेच त्या युगांतील प्रजेत हे गुण होते. त्याचप्रमाणे त्रेतायुग यज्ञसामग्री धारण करणारे तर द्वापारयुग शस्त्रास्त्रांनी सज्ज असे केले.१५. (कृतयुगांत चतुष्पाद असलेल्या धर्माचा) एक एक पाद त्रेतादि युगांत क्रमाने कमी होऊन द्वापारांत द्विपाद झाल्याने पाप व पुण्य, उग्रता व शांती तसेच दया व निष्ठुरता यांचे मिश्रण असते. तर कलियुगांत धर्माचा एकच पाय राहतो. **'तु'** शब्दाने कलियुगाचे वेगळेपण सूचित केले आहे. त्याने एका हाताने जिह्वा आणि दुसऱ्या हाताने लिंग धरले आहे. म्हणजेच या युगांतील लोक जिभेचे चोचले पुरविणारे आणि कामपर असतील. कलियुग मळकट, असाधु आणि पिशाचासारखे वेडेवांकडे चाळे करणारे आहे.१६.

**एकैकं यतकालं कौ प्रेरयद्विश्वहेतवे । प्रयाणकाले कलये प्रोक्तां गुरुकथां शृणु ।।१७।।**

**।। कलिरुवाच ।।**

**कथं यास्ये वृषपर-प्रशान्तजनसेविताम् । भुवं श्रुत्वापि मे चेतः खिद्यतेऽङ्गं च तप्यते ।।१८।।**
**छेत्ताहं धर्मसेतोः शुक्कलहद्वेषतापकृत्। भ्रातान्यस्त्रीस्वहर्ता मे षड्-द्विड्भाक्प्राणवल्लभः ।।१९।।**
**क्षतव्रतोऽपि मे प्राणो नास्तिकोऽधार्मिकोऽपि मे । ये स्थिता भारते वर्षे धार्मिकास्ते ममारयः ।।२०।।**

कलिः उवाच। वृषपर+प्रशांत+जन+सेवितां भुवं कथं यास्ये? श्रुत्वा अपि मे चेतः खिद्यते, अङ्गं च तप्यते।१८। अहं धर्म+सेतोः छेत्ता, शुक्+कलह+द्वेष+ताप+कृत्। भ्राता+अन्य+स्त्री+हर्ता षड्+द्विड्+भाक् मे प्राण+वल्लभः।१९। क्षत+व्रतः अपि मे प्राणः, नास्तिकः अधार्मिकः अपि। ये भारते वर्षे स्थिताः धार्मिकाः ते मम अरयः।२०।

प्रत्येक युगाला त्याचा कालावधि नेमून जगताच्या स्थैर्यासाठी भूमीवर पाठविले. कृताचा कालावधि सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षे, त्रेतायुगाचा बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षे, द्वापाराचा आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षे तर कलीचा चार लक्ष बत्तीस हजार वर्षे असा आहे. कलियुगाला (भूमीवर) पाठवितांना (ब्रह्मदेवाने) सांगितलेली गुरुकथा तूं ऐक.१७. ब्रह्मदेवाने पृथ्वीवर जाण्याची आज्ञा केल्यावर धर्माला घाबरून कली म्हणतो, 'धर्मपर प्रशांत असे लोक ज्या भूमीवर राहतात तिथे मी कसा जाऊं? त्या भूमीची वार्ता ऐकूनसुद्धा माझे मन खिन्न होते आणि माझ्या अंगाचा दाह होतो.'१८. 'मी धर्ममर्यादेचा उच्छेद करणारा आहे. शोक, कलह, द्वेष आणि ताप करणारा आहे. परधन व परस्त्री यांचा अपहार करणारे मला भावासारखे प्रिय आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांचे दास माझे प्राणसखे आहेत.'१९. 'व्रत, नेम सोडून देणारे, नास्तिक (परलोक नाहीच असे मानणारे) आणि अधर्मरत (धर्मविरुद्ध आचरण करणारे) जणूं माझे प्राणच आहेत. भारतवर्षांत राहणारे धार्मिक माझे वैरी आहेतच कारण त्यांचा मला ताप होतो.'२०.

**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरेक्षणात् । बहिर्यान्त्यसवो मेऽपि योगिज्ञानीक्षणात्क्षणात् ।।२१।।**

**।। ब्रह्मोवाच ।।**

**आसुर्या संपदा गच्छ वशा लोका भवन्ति ते । शतायुर्हि नरः कोऽपि धन्यो भूयान्न तं जहि ।।२२।।**
**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरो नरः । त्वद्दोषैर्लिप्यते नैव गुरुभक्तो विशेषतः ।।२३।।**
**नाम्बुनाब्जदलं यद्वल्लिप्यतेऽघैर्गुरुप्रियः । नैव जेतुं गुरोर्भक्तं देवा अपि न शक्नुयुः ।।२४।।**

गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपर ईक्षणात्, योगि+ज्ञानी+ईक्षणात् क्षणात् मे असवः बहिः यान्ति।२१। ब्रह्मा उवाच। आसुर्या संपदा गच्छ, लोकाः ते वशाः भवन्ति। नरः शत+आयुः। कः अपि धन्यः भूयात्। तं न जहि।२२। गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपरः नरः त्वत्+दोषैः न लिप्यते। विशेषतः गुरु+भक्तः न एव।२३। यत्+वत् अम्बुना अब्ज+दलं अघैः गुरु+प्रियः न लिप्यते। देवाः अपि गुरुभक्तं जेतुं न शक्नुयुः।२४।

'गुरु, ईश्वर, सात्त्विक ब्राह्मण आणि मातापितरांची सेवा करणाऱ्यांना (केवळ) पाहिल्यानेही माझे प्राण कंठाशी येतात. तसेच योगी, ज्ञानी यांच्या दर्शनाने मी क्षणांत मरायला टेकतो.'२१. ब्रह्मदेव त्याला धीर देतात, 'दंभ, दर्प, अभिमान, क्रोध आणि पारुष्य (कठोर वचन) ही आसुरी संपदा (भ.गी.१६:४) तुझ्याबरोबर पाठवीत आहे. त्यांना घेऊन जा म्हणजे लोक तुला वश होतील. माणसाचे आयुष्य केवळ शंभर वर्षेच असेल; एखादाच पुण्यवान् होईल. त्याचा घात करू नको.'२२. गुरू, ईश्वर, देव व ब्राह्मण यांची सेवा करणाऱ्यांना, विशेषतः गुरुभक्तांना तुझा दोष कधीच लागणार नाही.'२३. 'ज्याप्रमाणे कमलाच्या पानाला पाणी चिकटत नाही (छांदोग्योपनिषत् ४:१४:३) त्याप्रमाणे श्रीगुरुकृपापात्र शिष्याला पाप स्पर्शूं शकत नाही. गुरूच्या भक्ताला देवादिकसुद्धां जिंकूं शकत नाहीत, त्याला विघ्न करूं शकत नाहीत; मग इतरांची काय कथा?'२४.

## ।। कलिरुवाच ।।

**गुरुर्वरोऽमरेभ्योऽपि कथं वद हि यत्प्रियः । केनाप्यजेय इत्येतत्प्राग्वृत्तं क्वापि चेद्वद ।।२५।।**

## ।। ब्रह्मोवाच ।।

**ज्ञानं गुरुं विना न स्याद्यस्य कस्यापि निर्जराः । गुरुभक्त्यैव सिद्धार्थाः स्युस्ततोऽप्यधिको गुरुः ।।२६।।**

कलिः उवाच। यत् प्रियः केन अपि अजेयः (सः गुरुः) अमरेभ्यः अपि वरः कथं, वद। इति एतत् क्व अपि प्राक् वृत्तं चेत् वद।२५।
ब्रह्मा उवाच। यस्य कस्य अपि गुरुं विना ज्ञानं न स्यात्। निर्जराः अपि गुरुभक्त्या एव सिद्ध+अर्थाःस्युः। ततः अपि अधिकः गुरुः।२६।

कलि प्रश्न करतो, 'गुरू देवापेक्षांही इतके श्रेष्ठ कसे ज्यायोगे त्यांचे भक्तही अजिंक्य होतात? याविषयी कांही पूर्वेतिहास असल्यास सांगा.'२५. **देवतांना संसार आहे का?** ब्रह्मदेव कलीला सांगतात, 'गुरूशिवाय ज्ञान कुणालाही होत नाही. इंद्र, अश्विनीकुमार आदि देवही प्रजापति, दध्यङ्मुख इत्यादि गुरूंची भक्ती करूनच मोक्ष पावले. त्यामुळे त्यांच्यापेक्षां गुरू अधिक श्रेष्ठ आहेत.' 'स्वर्गस्थ इंद्रादि देवतांना कुठला संसार? आणि संसारच नसेल तर मोक्ष कशापासून?' ह्या शंकेचे समाधान असे आहे की श्रुतिवचनानुसार (ऐतरेय उ. १:२:१) त्या देवताही भूक-तहान इत्यादि स्वरूपाच्या संसारसागरांत पडतात; आणि त्यांतून मुक्त होण्यासाठी गुरूपसत्ति (सद्गुरूंना शरण जाणे) हाच उपाय सांगितला आहे. *'आचार्यवान् पुरुषो वेद'* (छां.उ. ६:१४:२) *'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ'* (कठ उ. १:२:९). तर मग मनुष्यांना तर यज्ञादि कर्माच्या अनुष्ठानाने चित्तशुद्धि होऊन मग मोक्ष मिळतो. देवांनी कर्मांद्वारे कुणाचे अनुष्ठान करायचे? मग चित्तशुद्धी कशी होईल? असे म्हणाल तर देवांना स्वभावतःच वेदांचे ज्ञान असल्याने मनुष्याप्रमाणे वेदाध्ययनासाठी उपनयनादि संस्कारांची त्यांना आवश्यकता नाही. तसेच त्यांचे अंतःकरण स्वभावतः शुद्ध असल्याने त्यांना यज्ञादि कर्मांचीही आवश्यकता नाही. ज्यांचे (मानवांचे) चित्त अशुद्ध असते त्यांना चित्तशुद्धी होऊन विविदिषा (वैराग्य) उत्पन्न होण्यासाठी कर्मकांडाद्वारे देवतांचे यजन करण्याची आवश्यकता असते.

**पुरा गोदावरीतीरे वेदधर्मैकदा मुनिः । बहुशिष्यप्रशिष्यस्तन्निष्ठां ज्ञातुमिदं जगौ ।।२७।।**
**तपसा क्षालितं पापं बहु प्रारब्धमस्ति मे । तद्भोग्यं व्याधिरूपेण काश्यां कस्तत्र रक्षकः ।।२८।।**

पुरा गोदावरी+तीरे एकदा वेदर्धमा बहु+शिष्य+प्रशिष्यः मुनिः तत् निष्ठां ज्ञातुं इदं जगौ।२७। तपसा पापं क्षालितं मे बहु प्रारब्धं अस्ति। ते व्याधि+रूपेण काश्यां भोग्यम्। तत्र कः रक्षकः अस्ति?२८।

*'तदुपरि बादरायणः संभवात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:३:२६) सांगितले आहे की मनुष्याच्या वर असणाऱ्या स्वर्गादिक लोकांतील देवतांनाही ज्ञानाचा अधिकार आहे असे बादरायणांचे मत आहे. उदाहरणार्थ, इंद्राने ब्रह्मचर्य धारण करून चार वेळां प्रजापतीला गुरू करून ज्ञान प्राप्त केले. तसेच अश्विनीकुमारांनी दध्यंचांना गुरू करून मधुब्राह्मण विद्या मिळविली. त्यावरून देवही गुरूची उपासना करून कृतार्थ झाले. अशा रीतीने गुरू त्यांच्याहून श्रेष्ठ आहेत.२६.

**प्रारब्ध भोगानेच संपवावे -** इथे एक पूर्वीचा इतिहास सांगतात. पूर्वी गोदावरीतीरावर वेदधर्मा मुनि रहात. त्यांना खूपसे शिष्य आणि प्रशिष्य होते. एकदा त्यांची श्रद्धा जाणण्यासाठी (त्यांच्या श्रद्धेची परीक्षा घेण्यासाठी) वेदधर्मा त्यांना म्हणाले.२७. 'धर्माने पापाचा नाश होतो' (महानारायणोपनिषत् १६:६), 'तपाने पापाचा नाश करतात' (मनुस्मृति १२:१०४) ह्या वचनांनुसार मी तपाने बरेच पाप धुवून टाकले आहे. तरी अजूनही माझे प्रारब्ध उरलेले आहे. ते व्याधिरूपाने मला काशीक्षेत्रांत राहून भोगायचे आहे. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो. ते पापरूप कर्म विविध आधी ज्यांत अंतर्भूत आहेत अशा व्याधीद्वारा मला भोगावे लागेल. किंवा (मुनींच्या मनोभूमिकेच्या संदर्भांत) असाही अर्थ करतां येईल की शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी असा दुःखद कर्मभोग आधीरहित (विवेकाने अनुद्विग्न मनाने) भोगायचा. त्या काशीत तुमच्यापैकी कोण माझे रक्षण करील?२८.

**गलत्कुष्ठाभिभूतस्य मम दंशादिवारणैः । क्षालनैरन्नदानैश्च प्रेम्णा कस्तत्र रक्षकः ।।२९।।**
**इति तस्य वचः श्रुत्वा तूष्णीं तस्थुर्भियाखिलाः । तत्रैको दीपको नाम शिष्य ऊचेऽभिवाद्य तम् ।।३०।।**
**न शेषयेद्दोषशेषं मोक्षविघ्नं भवत्कृतम् । ममात्मनैव भोक्ष्येऽहमनुज्ञां दातुमर्हसि ।।३१।।**

**।। गुरुरुवाच ।।**

**भोक्तव्यं स्वयमेवाघं नान्यद्द्वारेण तत्क्षयः । अतः कष्टेन तद्भोक्ष्ये काश्यां शक्तोऽसि चेदव ।।३२।।**

गलत्+कुष्ठ+अभिभूतस्य मम प्रेम्णा दंश+आदि+वारणैः, क्षालनैः अन्न+दानैः च कः तत्र रक्षकः?।२९। इति तस्य वचः श्रुत्वा अखिलाः भिया तूष्णीं तस्थुः। तत्र दीपकः नाम एकः शिष्यः तं अभिवाद्य ऊचे।३०। 'भवत्+कृतं मोक्ष+विघ्नं दोष+शेषं न शेषयेत्। अहं मम आत्मना एव भोक्ष्ये। अनुज्ञां दातुं अर्हसि'।३१। गुरुः उवाच। अघं स्वयं एव भोक्तव्यम्। अन्य+द्वारेण तत् क्षयः न। अतः तत् कष्टेन काश्यां भोक्ष्ये। (त्वं) शक्तः असि चेत् अव।३२।

तुम्ही सगळेच 'आम्ही करू' असे म्हणाल तर (नीट लक्ष देऊन) ऐका. पू आणि रक्त वाहणाऱ्या कुष्ठाच्या व्रणांनी व्यापलेल्या माझा माशा आणि किडांना निवारून, धुवून, मला अन्न भरवून, प्रेमपूर्वक तिथे माझा सांभाळ कोण करील?२९. हे त्यांचे बोलणे ऐकून सर्वजण भीतीने गप्प राहिले. एवढी अवघड जोखीम पत्करतां येत नाही आणि नाही म्हणावे तर गुरूंचा शाप होईल. तिथे एक दीपक नांवाचा शिष्य त्यांना (गुरूंना) वंदन करून म्हणाला.३०. 'दोषाचा अंशही बाकी ठेवू नये कारण तो मोक्षाला विघ्न करतो. आपले दुष्कृत मी माझ्या देहानेच भोगून टाकतो. आपण मला आज्ञा करावी.'३१. गुरु म्हणतात 'आपले पाप आपणच भोगावे. दुसऱ्याकरवी त्याचा क्षय होत नाही. गरुडपुराणांत म्हटले आहे, 'जीव एकटाच जन्माला येते आणि एकटाच मरण पावतो. एकटाच पुण्याचा भोग घेतो आणि एकट्यानेच पापही भोगावे लागते.' (प्रेतकल्पखंड, धर्मकांड १२:२३-२४). त्यासाठी मी हे कर्म कष्टाने काशीत भोगणार आहे. तुझी शक्ती असेल तर मला सांभाळ.'३२.

**इत्युक्तं गुरुणाश्रुत्य काशीं तेन समं ययौ । कुष्ठी भूत्वापि सोऽन्धोऽघं बुभुजे भेज एष तम् ।।३३।।**
**गुरुर्गलद्व्रणत्रस्तः कार्याकार्याज्ञ एव सन् । प्रतीपाचरणैः शिष्यं शश्वद्व्यर्थं व्यताडयत् ।।३४।।**
**स सेवावसरे भिक्षां सेवां भिक्षाक्षणेऽपि तम् । ययाचेऽहनदप्राप्तौ नाखिद्यत सदाप्यसौ ।।३५।।**
**दत्तां याचितकां भिक्षां मुनिस्तद्दोषकीर्तनात् । भूमौ प्रक्षिप्य रुष्टोऽन्नं स्वाद्वानीहीत्युवाच तम् ।।३६।।**

इति गुरुणा उक्तं आश्रुत्य (दीपकः) तेन समं काशीं ययौ। सः अपि कुष्ठी अंधः भूत्वा अघं बुभुजे। एष तम् भेजे।३३। गुरुः गलत्+व्रण+त्रस्तः कार्य+अकार्य+अज्ञ एव सन् प्रतीप+आचरणैः शिष्यं व्यर्थं व्यताडयत्।३४। सः तं सेवा+अवसरे भिक्षां भिक्षा+क्षणे सेवां अपि ययाचे। अप्राप्तौ अहनत्। असौ सदा अपि न अखिद्यत।३५। मुनिः याचितकां भिक्षां दत्तां तत् दोष+कीर्तनात् भूमौ प्रक्षिप्य रुष्टः 'वादु अन्नं आनीहि' इति तं उवाच।३६।

हे गुरूंचे वचन अंगीकारून (दीपक) त्यांच्यासह काशीला गेला. *'या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरेतसां। सा गतिः सर्वजन्तूनां गौतमीतीरवासिनां।। रेवातीरे तपः कुर्यान्मरणं जाह्नवीतटे। दानं दद्यात्कुरुक्षेत्रे तत्त्रयं गौतमीतटे।।'* (गौतमीमाहात्म्य) असे गोदावरीचे माहात्म्य असले तरी काशीक्षेत्राचा प्रभाव दर्शविण्यासाठी वेदधर्मा मुनि गोदावरीपासून काशीला गेले. तसेच कुष्ठादि रोगांचा स्वीकार केला. पुढे ५९व्या श्लोकांत हे स्पष्ट केले आहे. अशा रीतीने भोग भोगणाऱ्या आंधळ्या किंवा कुष्ठी गुरूची तो शिष्य सेवा करूं लागला.३३. वाहत्या व्रणांनी त्रासलेल्या गुरूंना योग्य अयोग्याचा विवेक राहिला नाही; आणि ते वेडेवाकडे वागून शिष्याला विनाकरणच मारूही लागले.३४. ते भिक्षेच्या वेळी सेवेची आणि सेवेच्या वेळी भिक्षेची मागणी करीत. लगेच न मिळाल्यास त्याला (शिष्याला) मारीत. तरीही तो खिन्न होत नसे. (प्रसन्नचित्ताने सेवा करीत असे.)३५. मागून आणलेली भिक्षा खातानाही, '(ते अन्न) थंड आहे, रुचकर नाही' अशी नावे ठेवीत रागाने जमिनीवर टाकून त्याला गोड अन्न आणायला सांगत.३६.

**भिक्षार्थमपि गच्छन्तं निवर्त्योचे कृता न मे । विण्मूत्रोत्सर्गसंशुद्धिः क्व यास्यश्नन्ति मक्षिकाः ।।३७।।**
**यथोक्तं कर्तुमुद्युक्तं निवार्योचे न वेत्सि माम् । क्षुधा कण्ठगतप्राणं देह्यन्नं पाप मे द्रुतम् ।।३८।।**
**भुक्त्वा याचितकान्नं स कदाचित्तात पुत्रक । श्रान्तोऽसि मे स्वपेत्युक्त्वा सुप्तेऽस्मिन्क्षुधितोऽब्रवीत् ।।३९।।**

भिक्षार्थं गच्छन्तं अपि निवर्त्य ऊचे, 'क्व यास्यसि? मे विट्+मूत्र+उत्सर्ग+संशुद्धिः न कृता। मक्षिकाः अश्नन्ति'।३७। यथा उक्तं कर्तुं उद्युक्तं निवार्य ऊचे, 'मां क्षुधा कण्ठ+गत+प्राणं न वेत्सि? पाप! द्रुतं मे अन्नं देहि'।३८। कदाचित् याचितक+अन्नं भुक्त्वा सः '(हे) तात, पुत्रक, श्रान्तः असि, स्वप,' इति उक्त्वा अस्मिन् सुप्ते 'क्षुधितः' अब्रवीत्।३९।

भिक्षेसाठी निघालेल्या शिष्याला थांबवून 'अरे! कुठे जातोस? माझ्या विष्ठा-मूत्रविसर्जनाची (तसेच जखमांतून वाहणाऱ्या पू, रक्त यांची) स्वच्छता केली नाहीस. या माशा मला चावताहेत,' असे बोलत.३७. त्यांच्या सांगण्यानुसार करायला गेल्यास 'अरे पाप्या! भुकेने माझे प्राण गळ्याशी आलेले तुला कळत नाहीत का? मला लवकर अन्न दे,' असे म्हणून त्याला अडवत. *'अन्नायुर्वा एष यद्वायुः'* या वचनानुसार (ऐ.उ. १:३:१०) अन्न हे प्राणाला शरीराशी जोडणारे बंधन असल्याने जीवनाचे कारण आहे. यासाठीच वाजसनेयांनी अन्नाला प्राणाला बांधून ठेवणारी दोरी (दाम) (बृ.उ. २:२:१) असा विचार मांडून अन्नाच्या अभावाने प्राण देठापासून वेगळ्या झालेल्या फळासारखा शरीरांतून सुटून जातो असे म्हटले आहे (बृ.उ. ४:३:३६). त्यानुसार वेदधर्मा 'मला अगतिकाला जर भुकेने मरण आले तर ती हत्या तुला लागेल.' म्हणून त्याला 'पाप्या!' असे संबोधन केले आहे.३८. कधी कधी शिष्याने मागून अणलेले अन्न खाऊन गुरूंनी म्हणावे, 'बाबा रे! माझं करून थकला असशील बाळा! झोप.' त्यावर तो शिष्य झोपतो न झोपतो तोंच 'अरे मला भूक लागलीय्,' असे म्हणावे. शिष्याला तात म्हटले आहे. 'तनोति' म्हणजे वंश वाढवतो तो 'तात'. शिष्य स्वतःच्या शिष्यप्रशिष्यांद्वारे गुरुपरंपरेचा विस्तार करतो. या अर्थाने हे संबोधन यथार्थच आहे.३९.

**एवं संछलितोप्येष भेजेऽखेदोऽनिशं गुरुम् । विस्मृतस्वात्मयात्रोऽपि मत्त्वा सर्वामरेश्वरम् ।।४०।।**
**गाङ्गाम्भो गुरुपादाम्भः साक्षाद्विश्वेश्वरं गुरुम् । सर्वानन्दनिधिं बुद्ध्वा मनो न क्वाप्यचोदयत् ।।४१।।**
**गुरुभक्तिसुपूतोऽभूज्ज्ञात्वा विश्वेश्वरोऽप्यमुम् । प्राप्योचे वरदोऽस्मीष्टं वरं वरय तेऽस्तु शम् ।।४२।।**
**दीपकोऽप्याह किं कार्यं वरेण गुरवस्तु मे । रुक्शान्त्यै वरमिच्छन्ति यदि पृष्ट्वा वृणोमि तत् ।।४३।।**

एवं संछलितः अपि एष अखेदः अनिशं विस्मृत+स्व+आत्म+यात्रः अपि गुरुं सर्व+अमर+ईश्वरं मत्वा भेजे।४०। गुरु+पाद+अम्भः गाङ्ग+अम्भः, गुरुं साक्षात् विश्वेश्वरं सर्व+आनन्द+निधिं बुद्ध्वा मनः क्व अपि न चोदयत्।४१। विश्वेश्वरः अपि अमुं गुरु+भक्ति+सुपूतः अभूत् ज्ञात्वा प्राप्य ऊचे, 'वरदः अस्मि। वरं वरय। ते शं अस्तु!'।४२। दीपकः अपि आह। वरेण मे किं कर्यिम्? यदि गुरवः रुक्+शान्त्यै वरं इच्छन्ति (तं) पृष्ट्वा तत् वृणोमि।४३।

अशा रीतीने छळ करूनही हा शिष्य मात्र रात्रंदिवस न कंटाळता गुरूंनाच सर्वदेवेश्वर मानून त्यांची सेवा आपल्या देहाची पर्वा न करतां करीत होता.४०. गुरूच साक्षात् विश्वेश्वर आहेत, गुरूंचे चरणतीर्थ हेच गंगाजल आणि गुरूच सर्व सुखाचे आगर आहेत असे जाणून (त्या शिष्याने) आपले मन इतर कोणत्याही देवतांकडे जाऊं दिले नाही. इतर कुठल्याही दैवताच्या दर्शनादीचा संकल्पही मनांत येऊं दिला नाही.४१. हा दीपक गुरुभक्तीच्या योगाने अत्यंत पवित्र (शुद्धचित्त) झाला आहे असे जाणून भगवान् विश्वेश्वर त्याच्याकडे येऊन म्हणाले, 'मी (प्रसन्न होऊन) वर देत आहे. तू वर मागून घे. तुझे कल्याण असो.' दुःखाचा क्षय करणारे ('*श्यति*') ते 'शं' म्हणजे कल्याण.४२. दीपक म्हणाला 'मला वर काय करायचा? माझ्या गुरूंना रोगाच्या शमनासाठी वर हवा असल्यास त्यांना (ते सध्यां इथेच असल्याने) विचारतो. त्यांची इच्छा असेल तर तो वर मी घेईन.'४३.

**इत्युक्त्वैत्य शशंसास्मै गुरुस्तप्तोऽब्रवीत्स तम् । भोगादेव क्षयं नेष्ये सेवायां मे बिभेष्यपि ।।४४।।**
**तच्छ्रुत्वा स तथेत्युक्त्वा शिवमेत्याब्रवीद्वरम् । न गुर्वसंमतं काङ्क्षे तच्छ्रुत्वागात्स दुर्मनाः ।।४५।।**
**निर्वाणमण्डपं गत्वा प्राह विष्णुमुखामरान् । चण्डो मुनिर्वेदधर्मा रुग्णस्तच्छिष्य उत्तमः ।।४६।।**
**गुरुभक्तः कम्बलाश्वतरासन्नोऽस्ति दीपकः । वरं दातुमगां प्रेम्णा नाददे स गुरूद्यतः ।।४७।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तं द्रष्टुकामो हरिर्ययौ । विष्णुर्दीपकमाहाङ्ग वरदोऽस्मि वरं वृणु ।।४८।।**

इति उक्त्वा अस्मै एत्य शशंस। गुरुः तप्तः, तं अब्रवीत्। भोगात् एव क्षयं नेष्ये। मे सेवायां बिभेषि अपि?।४४। तत् श्रुत्वा स 'तथा' इति उक्त्वा शिवं एत्य अब्रवीत्, 'गुरु+असंमतं वरं न काङ्क्षे'। तत् श्रुत्वा सः दुर्मनाः अगात्।४५। निर्वाण+मण्डपं गत्वा विष्णु+मुखान् अमरान् प्राह। चण्डः रुग्णः मुनिः वेदधर्मा तत् शिष्यः कम्बल+अश्वतर+आसन्नः दीपकः अस्ति। प्रेम्णा वरं दातुं अगात्। सः गुरु+उद्यतः न आददे।४७। इति ईश+वाक्यं श्रुत्वा हरिः तं द्रष्टुकामः ययौ। विष्णुः दीपकं आह, '(हे) अङ्ग, वरदः अस्मि, वरं वृणु।४८।

असे (विश्वेश्वरांना) बोलून (दीपकाने) गुरूंकडे येऊन त्यांना हे वृत्त सांगितले. (आपल्या रोगनिवारणासाठी वर मागून घेऊं का असे विचारले.) तेव्हां गुरू संतापून म्हणाले, 'माझे प्रारब्धकर्म मी भोगूनच संपवीन. माझ्या सेवेला भितोस (उबगलास) काय?'.४४. ते (सदगुरूंचे वचन) ऐकून 'तसे (ईश्वराला सांगतो)' असे म्हणून शंकरांकडे येऊन 'गुरूंना मान्य नसलेला (आपला) वर मला नको' असे सांगितले. हे ऐकून आपल्या वराच्या अनादराने हिरमुसलेले ते भगवान शंकर निघून गेले.४५. निर्वाणमंडपांत येऊन शंकरांनी विष्णुप्रमुख सर्व देवांना सांगितले की, 'वेदधर्मा नांवाचा अत्यंत कोपी मुनि व्याधिग्रस्त झाला आहे. त्याचा उत्तम शिष्य-.४६. गुरुभक्त दीपक कंबलाश्वतराजवळ गुरूंची सेवा करीत आहे. त्याला (त्याच्या तीव्र गुरुभक्तीने) प्रसन्न होऊन वर देण्यासाठी मी गेलो असतां तो गुरूंच्या सेवेत निमग्न असलेला शिष्य वर घेत नाही.'४७. हे ईश्वराचे वाक्य ऐकून श्रीहरि विष्णु दीपकाकडे जाऊन म्हणाले, 'प्रिय दीपका, मी वर द्यायला आलो आहे. तू वर मागून घे.'४८.

**तपसाष्टाङ्गयोगैश्च सूपायैर्मननादिभिः । उपवासैर्व्रतैर्योगैर्धर्मैर्गम्योऽस्मि नो नृणाम् ।।४९।।**
**गुरुसद्विप्रभक्तस्य मन्मयाभ्यन्तरात्मनः । निर्द्वन्द्वस्याऽपि साध्व्याश्च विष्णुर्दृश्योऽस्मि सर्वदा ।।५०।।**
**तस्मात्कष्टेन सुभग सद्गुरुः सेवितस्त्वया । तेनैव परितुष्टोऽस्मि वरं वरय मत्प्रिय ।।५१।।**

**।। दीपक उवाच ।।**

**श्रीसद्गुरुर्देवदेवो यतो ज्ञानं ततोऽमृतम् । अतोऽधिकं किमस्माकं भवन्ति त्वादृशा वशाः ।।५२।।**

तप+साष्टाङ्ग+योगैः मननादिभिः सु+उपायैः उपवासैः व्रतैः योगैः धर्मैः (अहं) नृणां गम्यः अस्मि नो।४९। गुरु+सत्+विप्र+भक्तस्य मत्+मय+अभ्यन्तर+आत्मनः निर्दन्द्वस्य साध्व्याः च (अहं) विष्णुः सर्वदा दृश्यः अस्मि।५०। तस्मात् (हे) सुभग, त्वया कष्टेन सद्गुरुः सेवितः, तेन एव परितुष्टः अस्मि। (हे) मत्प्रिय, वरं वरय।'।५१। दीपक उवाच। 'श्रीसद्गुरुः देवदेवः यतः ज्ञानम्। ततः अमृतम्। अस्माकं अतः अधिकं किम्? त्वादृशाः वशाः भवन्ति'।५२।

'कृच्छ्रादि तपाने, अष्टांग योग अथवा मननादि सुगम उपायांनी, उपवासानी, व्रतांनी, विविध योगांनी तसेच धर्माचरणानेही मानवांना मी अप्राप्य आहे.'४९. '(मात्र) गुरू, संत, ब्राह्मण यांची भक्ती करणाऱ्या (सुखदुःखादि) द्वंद्वातीत, माझ्याशी एकरूप झालेल्या भक्तांना आणि पतिव्रता स्त्रियांना मी सदैव दृश्य असतो.'५०. 'हे भाग्यवंता, (आमच्या दर्शनानंतर कुणी भाग्यहीन असूं शकतच नाही हे सुचविण्यासाठी) मोठ्या कष्टांनी तू सद्गुरूंची सेवा केली आहेस. त्यानेच मी परम प्रसन्न झालो आहे. माझ्या प्रिय भक्ता, वर मागून घे.'५१. दीपक म्हणाला, 'श्री म्हणजे ऐश्वर्याने युक्त असा हा सद्गुरू देवांचाही देव आहे.' यांतून 'आपणही रामकृष्णादि अवतारांमध्ये गुरुभक्तिरसाचा आस्वाद घेतला आहेच कीं!' असे जणू दीपक भगवान विष्णूंना सुचवीत आहे. 'कारण या गुरूंपासून ज्ञान आणि त्या ज्ञानापासूनच मोक्ष. अर्थात्च ह्या सद्गुरूंपेक्षा अधिक असे आम्हांला काय आहे? अर्थात्च कांही नाही. (त्यांच्या कृपेनेच) आपणांसारखेही आमच्या अधीन होतात. 'ब्रह्मज्ञानी पुरुषाला (त्याचे अंगभूतच असलेले) सर्व देव बली - इष्टार्थ अर्पण करतात' असे वेदवचन आहे. (तै.उ. १:५:३). एवढा श्रीगुरूंचा महिमा आहे.'५२.

**चेद्विश्वेशो यथा यातस्तथा गन्तुं न रोचते । गुरावेवाचलां भक्तिं देह्यन्यत्र वृणेऽध्रुवम् ।।५३।।**

**।। विष्णुरुवाच ।।**

**श्रद्धाभक्तिः सदा तेस्ति दास्येऽप्यन्यदयाचितम् । दत्ता भुक्तिश्च ते मुक्तिः सत्कीर्तिः स्मर्तृतापहृत् ।।५४।।**
**यः स्तौति सद्गुरुं भक्त्या वेदोपनिषदादिभिः। तुष्टिर्मे तेन दास्यैश्च सान्निध्यं तस्य मे सदा ।।५५।।**

विश्वेशः यथा यातः तथा गन्तुं न रोचते चेत् गुरौ एव अचलां भक्तिं देहि। अन्यत् अध्रुवं न वृणे।५३। विष्णुः उवाच। 'श्रद्धा+भक्तिः ते सदा अस्ति। अन्यत् अपि अयाचितं दास्ये। ते भुक्तिः मुक्तिः स्मर्तृ+ताप+कीर्तिः च दत्ता।५४। यः सद्गुरुं भक्त्या वेद+उपनिषदादिभिः स्तौति तेन, दास्यैः च मे तुष्टिः। तस्य मे सदा सान्निध्यम्।५५।

'परंतु भगवान विश्वेश्वरांसारखेच आपल्यालाही परत पाठविणे मला रुचत नाही. एवढ्यासाठी, आपण मला गुरूंच्या ठायी स्थिर भक्ती द्यावी. याहून दुसरा कोणताही स्त्रीपुत्रादि नाशिवंत वर मी इच्छित नाही. कारण ते ज्ञानाला प्रतिबंधच करतील.' गुरुभक्तीच खऱ्या अर्थाने अविनाशी आहे; कारण श्रुतिवचनानुसार तीच मोक्षपर्यवसायी आहे. श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटले आहे कीं, 'ज्याची ईश्वरावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच (परम भक्ती) गुरूंवर आहे, त्याच्यां(चित्तां)तच हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील.'५३. भगवान विष्णु (अत्यंत प्रसन्नतेने) म्हणतात, 'तुझी (सद्‌गुरूंच्या ठायीं) श्रद्धा व भक्ती निरंतर असेल. आणखीहि तूं न मागितलेले मी देत आहे. तुला सर्व इष्ट भोग दिले. आणि या भोगांमुळे चित्ताचा विक्षेप होऊन मुक्ती दुरावूं नये म्हणून तुला मुक्तीही दिली. विषयांचे सेवन करीत असतांनाही ह्या वरदानाच्या प्रभावाने तू त्यांत आसक्त होणार नाहीस. अर्थात्‌च चित्ताचा विक्षेप होणार नाही आणि मुक्तीचा मार्ग सुकर होईल. मुक्त होऊनसुद्धां भोगांत रमणारा अशी निंदा लोक करतील असे तुला वाटत असल्यास तुझी उत्तम आणि (तुझे) स्मरण करणाऱ्याचे त्रिताप हरण करणारी, कीर्तीही मी देत आहे.'५४. जो सद्गुरूंचे वेद आणि उपनिषदांनी स्तवन करतो त्या स्तवनाने तसेच त्याने केलेल्या सद्गुरूंच्या दास्याने मला संतोष होतो. मी सतत त्याच्या सन्निध असतो.'५५.

**कालादपि भयं नास्ति कुतोन्यस्मात्तु सिद्धयः । स्युस्तद्दास्योऽधिकं नात इत्युक्त्वान्तर्दधे हरिः ।।५६।।**
**शिष्योऽपि गुरवे सर्वं शशंस स तु तत्क्षणम् । प्रीतः सुखाकरकरं दधौ तन्मूर्ध्नि सद्गुरुः ।।५७।।**
**तेन सद्योऽभवच्छिष्यो वेदवेदाङ्गपारगः । कुशलः स्मर्तृतापघ्नो जीवन्मुक्तोऽखिलप्रियः ।।५८।।**
**काशीप्रभावमादेष्टुं शिष्यभावं परीक्षितुम् । वेदधर्माऽभवत्कुष्ठी पापशङ्का कुतो मुनेः ।।५९।।**

'कालात् अपि भयं नास्ति, कुतः अन्यस्मात्?। सिद्धयः तत् दास्यः स्युः। अतः अधिकं न।' इति उक्त्वा हरिः अन्तर्दधे।५६। शिष्यः अपि गुरवे सर्वं शशंस। सः सद्गुरुः तु तत् क्षणं प्रीतः सुख+आकर+करं तत् मूर्ध्नि दधौ।५७। तेन शिष्यः सद्यः वेद+वेदाङ्ग+पारगः कुशलः स्मर्तृ+ताप+घ्नः जीवन् मुक्तः अखिल+प्रियः अभवत्।५८। वेदधर्मा काशी+प्रभावं आदेष्टुं, शिष्य+भावं परीक्षितुं कुष्ठी अभवत्। मुनेः पाप+शङ्का कुतः?।५९।

'सर्वसंहारक काळापासूनसुद्धा त्याला भय नसेल; मग विघ्नादि इतरांची काय कथा? सर्व सिद्धि त्याच्या दासी होतील. ह्यापेक्षा अधिक देण्यासारखे काही राहिले नाही.' असे बोलून श्रीहरि अंतर्धान पावले.५६. शिष्याने गुरूंना हे सर्व निवेदन केले. त्या सद्‌गुरूंनीही प्रसन्न होऊन तत्क्षणी सुखाची खाण असलेला आपला हात त्या शिष्याच्या मस्तकावर ठेवला. 'ज्ञानप्राप्तीसाठी शिष्याची प्रज्ञाच कारण आहे' असे वसिष्ठ मुनींनी रामाला सांगितले असले (योगवासिष्ठ निर्वाण प्र. पूर्वार्ध ६:१३) तरी '(ज्ञानाला प्रतिबंधक) परिपक्व मलांना नष्ट करण्यासाठी शक्तिपात करून (सद्‌गुरू शिष्याचा) परम तत्त्वाशी योग करून देतात,' या उक्तीवरून गुरुप्रसादही ज्ञानप्राप्तीचे कारण आहे.५७. त्या शक्तिपाताने शिष्याला तात्काळ वेदवेदांगांचे शाब्द (परोक्ष) ज्ञान तर झालेच पण परब्रह्माचा साक्षात्कारही झाला; आणि तो सर्वांना प्रिय, कुशल, केवळ स्मरणामात्रे ताप नाहीसे करणारा जीवन्मुक्त झाला.५८. काशी क्षेत्राच्या प्रभावाचे प्रबोधन करण्यासाठी तसेच शिष्याच्या भक्तीची परीक्षा घेण्यासाठी वेदधर्मा कुष्ठी झाले. एऱ्हवी मननशील अशा त्यांना पापाची शंकासुद्धा कशी स्पर्शेल?५९.

**इत्याद्या भूरिशो वृत्ताः कले गुरुकथा भुवि । वक्तृश्रोतृमलघ्न्योऽतो भक्तं मा प्रेक्ष गां व्रज ।।६०।।**
**इत्यादिष्टः कलिर्धात्रा भुवमेत्य तथाऽकरोत् । महिमा लौकिकस्यायं किं पुनस्त्र्यात्मसद्गुरोः ।।६१।।**
**तत्सात्विकीं धृतिं लब्ध्वा दृढभक्त्यैव सद्गुरुम् । भजन्ति कृतकृत्यास्ते भवन्ति न ससंशयाः ।।६२।।**
**तस्माद्यदीच्छसि श्रेयः श्रद्धयाऽसंशयं भज । गुरुं नृधाम्ना क्रीडन्तं भवाब्धेः पारमेष्यसि ।।६३।।**

**इति श्रीगुरुचरिते गुरुशिष्यचरितानुकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।२।।**

'(हे) कले, इत्याद्याः भूरिशः वृत्ताः। गुरुकथा भुवि वक्तृ+श्रोतृ+मलघ्न्यः। अतः भक्तं मा प्रेक्ष गां व्रज'।६०। इति धात्रा आदिष्टः कलिः भुवं एत्य तथा अकरोत्। अयं लौकिकस्य (गुरोः) महिमा। किं पुनः त्रि+आत्म+सद्गुरोः?।६१। तत् सात्त्विकीं धृतिः लब्ध्वा दृढ भक्त्या एव सद्गुरुं भजन्ति (ते) कृतकृत्याः भवन्ति। न ससंशयाः।६२। तस्मात् यदि श्रेयं इच्छसि श्रद्धया असंशयं नृ+धाम्ना क्रीडन्तं सद्गुरुं भज। भव+अब्धेः पारं एष्यसि।६३।

(कथा पूर्ण झाल्यावर ब्रह्मदेव म्हणतात) 'हे कले, अशा बऱ्याच घटना भूलोकी झाल्या आहेत. ह्या गुरुकथा वक्त्याच्या आणि श्रोत्याच्या पापांचा नाश करतात. तरी तू गुरुभक्तांकडे पाहू नकोस. हे ध्यानात ठेवून तू पृथ्वीवर जा'.६०. अशा ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणे कलीने पृथ्वीवर येऊन तसेच केले. हा लौकिक सद्गुरूंचा महिमा आहे; तर मग त्रयमूर्ति सद्गुरूंचा महिमा काय सांगावा?६१. असा हा दृष्टांत सांगून झाल्यावर अर्थांतरन्यासाने तो दृढ करतात. त्यासाठी गीतेत प्रतिपादलेल्या सात्त्विक धृतीची (१८:३३) प्राप्ती करून जे दृढभक्तीने सद्गुरूंची भक्ती करतात ते कृतकृत्य होतात; 'ज्या एकनिष्ठ धृतीने मन, प्राण, इंद्रियें यांच्या क्रिया नियंत्रित करतां येतात.' अशी धृति नसलेले संशयग्रस्त मात्र होत नाहीत.६२. त्यासाठी कल्याणाची (मोक्षाची) इच्छा असेल संशयरहित होऊन मानव देहांत लीला करणाऱ्या गुरूंची भक्ती कर. भवसागर पार करशील. 'भवाब्धिं द्राक्तरिष्यसि' असाही पाठ आहे.६३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील दुसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अथ तृतीयोऽध्यायः।।

**नामधारक उवाच ।।**

**त्र्य्यात्मासौ कुतो जातो भूमौ नर इवेश्वरः । यं ब्रवीषि परं ब्रह्म तन्मे शुश्रूषवे वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**धन्योऽस्यनुगृहीतोऽसि यत्ते भक्तिरधोक्षजे । संजाता भवबन्धघ्नी हर्षो मेऽतीव वर्धते ।।२।।**

**कोऽपि गां पर्यटन्तं मां न पृच्छति गुरोः कथाम् । त्वयाद्य भक्तचन्द्रेण बोधाब्धिर्मे प्रपूरितः ।।३।।**

नामधारक उवाच। असौ त्र्य्यात्मा ईश्वरः, यं परं ब्रह्म ब्रवीषि, भूमौ नर इव कुतः जातः तत् मे शुश्रूषवे वद।१। सिद्ध उवाच। धन्यः असि, अनुगृहीतः असि, यत् ते अधोक्षजे भव+बन्ध+घ्नी भक्तिः संजाता। मे हर्षः अतीव वर्धते।२। गां पर्यटन्तं मां कः अपि गुरोः कथां न पृच्छति। अद्य त्वया भक्त+चन्द्रेण मे बोध+अब्धिः प्रपूरितः।३।

अनसूयेचे सत्त्व हराया तिसऱ्या अध्यायी। स्त्रीहट्ट पुरविण्या आली देवत्रयी। झाली बाळे, अशी सतीची मोठी पुण्याई। तशीच वदले सिद्ध सरस्वति अंबरीषकथाही।।१।।

आपण केलेल्या प्रश्नांपैकी एकाचे (गुरूंचा रोष झाल्यास कुणीच (देवही) रक्षण करूं शकत नाही हे कसे?) या प्रश्नाचे उत्तर मिळाले पण 'हे गुरू त्रयमूर्ति कसे झाले?' या प्रश्नाचे 'नरदेहाने लीला करीत आहेत' असे संकेतात्मक उत्तर मिळाल्याने अधिक स्पष्टीकरणाच्या अपेक्षेने नामधारक विचारीत आहे. 'ज्याला आपण परब्रह्म असे म्हणतां अशा ह्या त्रिमूर्ति भगवंताने मानवासारखा पृथ्वीतलावर कसा जन्म घेतला? ते मला ऐकायचे आहे तरी (कृपा करून मला) सांगा.'१. सिद्धमुनि त्याचे अभिनंदन करीत म्हणतात, 'धन्य आहेस. तुझ्यावर (गुरूंचा) अनुग्रह झाला आहे. तुझ्या मनांत संसारपाशांतून सोडवणारी भगवद्भक्ती उद्‌भवली आहे हे पाहून मला अतीव आनंद झाला आहे.'२. '(खरोखर) ह्या भूमीवर विचरत असतां मला कुणीही गुरूच्या कथा विचारीत नाही. तुझ्यासारख़्या भक्तरूपी चंद्राच्या दर्शनाने माझा ज्ञानसागर उचंबळून आला आहे.'३.

**अनन्ताः सन्त्यनन्तस्य लीलाः प्रश्नमृतेपि ताः । न वक्तुर्यान्ति निजधी-परिणामावधिं स्मृतिम् ।।४।।**
**कलौ तु नास्तिका मर्त्यास्तत्कथाश्रवणात्मकम् । प्लवं तर्तुं भवाब्धिं नो विदुर्मज्जन्त्यतोऽत्र ते ।।५।।**
**यत्राम्बववित्तु तृष्णोर्मिर्ग्रहाः कामादयो ध्वनिः । भोगोऽपारेऽत्र नौस्त्वेषा गुरुर्नेता कृपामरुत् ।।६।।**

अनन्तस्य लीलाः अनन्ताः सन्ति। निज+धी+परिणाम+अवधिं वक्तुं ताः अपि प्रश्नं ऋते स्मृतिं न यान्ति।४। कलौ तु नास्तिकाः मर्त्याः भवाब्धिं तर्तुं तत्+कथा+श्रवण+आत्मकं प्लवं नो विदुः। अतः ते अत्र मज्जन्ति।५। यत्र अवित् तु अम्बुः, तृष्णा ऊर्मिः, कामादयः ग्रहाः, भोगो ध्वनिः। अत्र अपारे तु एषा नौ, गुरुः नेता, कृपा मरुत्।६।

'अनंत अशा भगवंताच्या लीला अनंत आहेत. आपल्या बुद्धीच्या मर्यादानुसार त्या आठवल्या तरी कुणी तरी प्रश्न केल्याशिवाय त्या सांगितल्या जात नाहीत.'४. या कलियुगातील नास्तिक मानवांना भवसागरातून तारणारी गुरुकथाश्रवणरूपी नौका माहीत नसल्याने ते ह्या संसारसागरांत बुडत असतात.'५.

**भवसागर -** ज्या भवसागरांत, अज्ञान हेच पाणी आहे, आशांच्या उंच उंच लाटा आहेत, कामक्रोधादि षड्रिपु ह्याच सुसरी आहेत, सुखदुःखांच्या भोगाने प्रस्फुटणारे हर्षशोकाचे ध्वनि हेच त्या सागराचे गाज आहेत. ह्या अपार भवाब्धीत ही गुरुकथा नावेसारखी आहे, गुरूच सारंग आहेत आणि त्यांची कृपा हाच अनुकूल वारा आहे. भगवत्पूज्यपादाचार्यांनी (ऐतरेय उपनिषदातील १:२:१ या मंत्रातील *'अस्मिन्महत्यर्णवे'* या पदावरील भाष्यांत) असे रूपक केले आहे. 'अविद्या, काम आणि कर्म यांच्यायोगे झालेले प्रचंड दुःख हेच पाणी; तीव्र व्याधी, जरा आणि मृत्यू ह्याच सुसरी-मगरी; विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणाऱ्या सुखालेशाचा क्षणभंगुर विसावा सोडल्यास पांचही इंद्रियांच्या तृष्णारूपी वायूने क्षोभविलेल्या शेकडो अनर्थांच्या प्रचंड लाटा; महारौरवादि अनेक नरकातील जीवांच्या हाहाःकाराच्या आक्रोशातून घुमणारा कल्लोळ; असा हा अनादि, अनंत, अपार, निराधार संसारसागर! इथे सत्य, आर्जव, दान, दया, अहिंसा, शम, दम, धृति इत्यादि आत्मगुणांच्या शिदोरीने भरलेली ज्ञानरूपी नौका आहे; सत्संग आणि सर्वत्याग हाच मार्ग आहे आणि मोक्ष हे तीर आहे.'६.

**तस्माद्दिष्ट्या साधनानि प्राप्तान्यत्राप्ययत्नतः । तरिष्यसि भवाब्धिं स्रागतो वक्ष्ये कथाः श्रृणु ।।७।।**
**इत्युक्त्वाऽमरजाभीमासङ्गमे ह्युपविश्य सः । गुर्वधिष्ठितकल्पद्रु-मूलेऽस्मै प्राह सत्कथाः ।।८।।**
**मुमुक्षुभेषजं मुक्त-जीवनं विषयीष्टदं । श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वाद्वच्मि तेऽल्पकम् ।।९।।**

तस्मात् दिष्ट्या अत्र अयत्नतः अपि साधनानि प्राप्तानि। भवाब्धिं स्राक् तरिष्यसि। अतः कथाः वक्ष्ये। शृणु।७। इति उक्त्वा सः अमरजा+भीमा+सङ्गमे गुरु+अधिष्ठित+कल्प+द्रु+मूले हि उपविश्य अस्मै सत्कथाः प्राह।८। श्रीगुरोः चरितं मुमुक्षु+भेषजं मुक्त+जीवनं विषयी+इष्टदं वाक्+हृत्+दूरत्वात् ते अल्पकं वच्मि।९।

त्याप्रमाणे सद्भाग्याने सद्गुरुभेट आणि गुरुकथाश्रवण ही साधने अनायासे तुला इथे लाभली आहेत. तू शीघ्रच भवसागर तरून जाशील. तरी मी कथा (गुरुचरित्र) सांगतो ती तू ऐक.'७. असे बोलून ते सिद्ध मुनि भीमा आणि अमरजा संगमावर श्रीगुरू नरसिंहसरस्वतींनी स्थापिलेल्या कल्पवृक्षाच्या तळवटी बसून ह्या शिष्यत्वाने अंगीकारलेल्या नामधारकाला गुरुचरित्रातील सुंदर कथा (किंवा सत् म्हणजे भगवंत त्याच्या कथा - भगवत्कथा) सांगू लागले. श्रीगुरूंनी स्थापल्याने त्या अश्वत्थाला कल्पवृक्षत्व आले आहे. शिवाय त्या वृक्षांत मनोकामना पूर्ण करण्याचा गुण आहे हे पुढे १९व्या अध्यायात स्पष्ट केले आहेच. ('ह्या अक्षय्य पुण्यदायक वृक्षाला पुत्रादि कामना पुरविण्यास वेळ लागत नाही.'(४५) 'तरी हे साध्वि, तू त्याची विधिवत् पूजा कर; तो शीघ्र फल देणारा आहे.'(४८).८.

**श्रीगुरुचरित्राची थोरवी -** ह्या मृत्युलोकात विषयासक्त, मुमुक्षु आणि मुक्त असे तीन प्रकारचे लोक आहेत. त्या तिघांनाही हे श्रीगुरूंच्या चरित्राचे वाचन कसे लाभदायक आहे ते सांगतात. विषयी लोकांच्या कामना ह्याच्या पठणाने अथवा श्रवणाने पूर्ण होतात; तर मुमुक्षूंसाठी ते संसाररूपी व्याधीपासून सोडविणारे औषध आहे; मुक्तांना निरुपम आनंदाचा ठेवा असल्याने जीवनभूत आहे; तसेच 'वेदांत, गुरु आणि ईश्वर या त्रयीचे आजीवन सेवन करावे. आधी ज्ञानप्राप्तीसाठी आणि (ज्ञानप्राप्ती)नंतर कृतघ्नतादोष लागू नये यासाठी', (तत्त्वोपदेश - ८६)

**जगत्येकार्णवीभूते शेषतल्पश्रितोऽस्पृहः । नारायणो जगत्स्रष्टुं मायामुद्भाव्य सोऽण्डजम् ।।१०।।**
**स्रष्टारं व्यसृजत्सृष्ट्यै सप्तर्षीन् सोऽपि मानसान् । तत्रैकोऽत्रिस्तपस्वीशो यस्याभूद्भगवान्सुतः ।।११।।**

जगति एक+अर्णवी+भूते शेष+तल्प+श्रितः अस्पृहः नारायणः मायां उद्भाव्य सः अण्डजं स्रष्टारं व्यसृजत्। सः अपि मानसान् सप्तर्षीन् (असृजत्)। तत्र एकः तपस्वी अत्रिः यस्य ईशः भगवान् सुतः अभूत्।१०-११।

या वचनानुसार कृतघ्नता दोषाचा परिहार करून जीवन सफल करणारे आहे. गुरुचरित्रांत वेदांत, गुरू आणि ईश्वर या तिन्हींचेही प्रतिपादन आहे. हे गुरुचरित्र *'यतो वाचो निवर्तन्ते'* ह्या श्रुतीप्रमाणे (तै.उ. २:४), वाणीच्या आणि मनाच्याही अतीत आहे. तरी मी माझ्या बुद्धीप्रमाणे थोडेसे तुला सांगतो.९.

दुसऱ्या परार्धाच्या अंती ब्रह्मदेवाच्या दिनांतीं जो नैमित्तिक प्रलय होतो त्यावेळी सर्व जग जलमय झाल्याने एक समुद्रच राहतो. अशा त्या जलांतही शिल्लक असलेला जो शेष त्याचीच शय्या करून निष्काम असा नारायण ('नर' म्हणजे मानव; त्याच्यापासून झालेली तत्त्वे म्हणजे 'नार'; तीच ज्याचे *'अयन'* प्राप्तीचे उपाय आहेत. किंवा *'नार'* म्हणजे मानवसमुदाय हेच ज्याचे निवासस्थान आहेत तो (मनुस्मृति १:१०)) पहुडला असतां जगाची उत्पत्ती करण्यासाठी त्याने सदसद्विलक्षण अशी आपली अनिर्वाच्य प्रकृति निर्माण केली. जी खरी आहे किंवा नाही ह्याविषयी मानवी बुद्धीला निर्णय करतां येत नाही. निर्माण केली याचा या ठिकाणी अर्थ तिला आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) कार्यान्वित करून अंडापासून जन्मलेल्या ब्रह्मदेवाला जागे केले. (**उद्भाव्य** याचा अर्थ इथे जागे केले असा होतो. कारण हा नैमित्तिक प्रलय आहे जेव्हा ब्रह्मदेव झोपलेला असतो. प्राकृतिक प्रलयांती ब्रह्मदेवाचाही लय होत असल्याने त्या वेळी सृष्टीसाठी पुन्हां ब्रह्मदेवाची उत्पत्ति करावी लागते.) त्या जागलेल्या ब्रह्मदेवानेही मरीचि, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, पुलह, अंगिरस आणि दक्ष ह्या सप्तर्षींना आणि सनत्कुमार, सनक, सनन्दन, सनातन आणि नारद ह्या मानसपुत्रांना निर्माण केले. त्यांमध्ये अत्रि हा श्रेष्ठ तपस्वी होता, ज्याच्या पोटी भगवान श्रीदत्तप्रभूंनी जन्म घेतला.१०-११.

**ऋषेरत्रेस्तपोऽर्थस्य पातिव्रत्यविभूषिता । आसीद् भार्याऽनसूयाख्या त्रिलोक्यां विश्रुता सती ।।१२।।**
**जातोर्वी मृदुलार्काग्नी शीतौ मन्दो मरुद्भिया । तस्या देवाः पदापाय-भ्रान्त्याऽऽपुः शरणं हरिम् १३।।**
**एकदा नारदोऽप्येत्य तद्धर्मान्ब्रह्मविष्णवजान् । प्राब्रवीन्नेदृशी साध्वी सर्वदाऽभ्यागतप्रिया ।।१४।।**

तपः+अर्थस्य ऋषेः अत्रेः पातिव्रत्य+विभूषिता भार्या त्रिलोक्यां विश्रुतां सती आसीत्।१२। तस्या भिया ऊर्वी मृदुला, अर्क+अग्नी शीतौ, मरुत् मन्दः जाताः। देवाः पद+अपाय+भ्रान्त्या हरिं शरणं आपुः।१३। एकदा नारदः अपि ब्रह्म+विष्णु+अजान् एत्य तत् धर्मान् प्राब्रवीत्, 'सर्वदा अभ्यागत+प्रिया ईदृशी साध्वी न'।१४।

ईश्वराने सृष्टि उत्पन्न केल्याविषयी वेदवचने यापूर्वी (प्रथमाध्यायाच्या टीकेत) उद्धृत केली आहेत. इथे हे लक्षांत घ्यायला हवे की ईश्वराचे कर्तृत्व हे या वेदवाक्यांचे तात्पर्य नाही; तर ईश्वराच्या कर्तृत्वाचा निषेध करण्यासाठी आधी मायेचा विलास (सृष्टी) दाखविला आहे. आणि मग *'निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरञ्जनं'* (श्वेताश्वतर उ. ६:१९) *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०) *'नेह नानास्ति किञ्चन'* (कठ उ. २.४.११) *'यस्मिन्सर्वा..'* (ईशावास्य उ. ६) *'अतोऽन्यदार्त्तं'* (बृहदारण्यक उ. ३.४.२) अशा निषेधवाक्यांनी अद्वैताचा निरास केला आहे. यापेक्षा इथे विस्तार करीत नाही.

**अत्रि आणि अनसूया -** प्रस्तुत ग्रंथांत श्रीदत्तात्रेयांचे प्राधान्य असल्याने त्यांच्या अवताराचा उपोद्घात **ऋषेः** या श्लोकापासून केला आहे. ऋषी म्हणजे मंत्रदृष्टा. ऋग्वेद सर्वानुक्रमणीत सांगितल्याप्रमाणे अत्रि ऋषी ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलाचे द्रष्टे आहेत. 'सूर्याला राहूने अंधःकाराने झांकोळले असतां अत्रि ऋषींनीच त्याला सोडविले. इतर कुणालाही ते शक्य झाले नाही' असा अत्रि ऋषींच्या ज्ञानाचा गौरव ऋग्वेदात केला आहे (ऋ. ४.४०.९). तप हेच ज्याचे अर्थ म्हणजे सर्वस्व आहे अशा अत्रींची पत्नी अनसूया होती. नांवाप्रमाणेच जिच्यात असूयेचा लेशही नव्हता. 'रसाकर' नांवाच्या ग्रंथात, केसांत घालायची, देहावर घालायची, परिधान करायची आणि विलेपन करायची अशी चार प्रकारची आभूषणे सांगितली असली तरी अनसूयेचे पातिव्रत्य हेच एकमेव भूषण होते हाच विशेष! तीनही लोकांत तिच्या पातिव्रत्याची ख्याति होती.

**इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य विषीदन्त्य उपस्थिताः । तद्देव्योऽसहमाना द्राग्बभूवुर्मूर्छिता भृशम् ।।१५।।**
**पतिव्रतामानिनीस्ताः सावित्रीश्रीश्वरीस्त्रयः । आश्वास्यातिथिवद्भूत्वा रोषाच्छम्भुं सतीं ययुः ।।१६।।**

इति ऋषेः वाक्यं आकर्ण्य उपस्थिताः तत्+देव्याः विषीदन्त्य द्राक् असहमाना भृशं मूर्छिता बभूवुः।१५। पतिव्रता+मानिनीः ताः त्रयः सवित्री+श्री+ईश्वरीः आश्वास्य (देवाः) अतिथिवत् भूत्वा रोषात् सतीं शम्भुं ययौ।१६।

'अत्रीची जशी अनसूया' असा तिचा दाखला वेदमंत्रांतही दिला आहे (ऋग्वेद परिशिष्ट).१२. 'ज्या परमात्म्याच्या धाकाने अग्नी, सूर्य, इंद्र, वायु, मृत्यू हे पाचही आपापली कार्ये करतात' (कठ उ. २.३.४) तोच धर्माचा आधार आहे. (*'एष सेतुर्विधरण'* बृ.उ. ४.४.२२) असा धर्मरूपी परमात्माच अनसूयेने आपल्या आचरणात स्वाधिकाराने संपूर्णतः धारण केल्याने, पृथ्वी त्या सतीला दुखवू नये म्हणून मृदु झाली, अग्नी आणि सूर्य शीतल झाले आणि वायुसुद्धा तिच्या भयाने मंद वाहू लागला. सर्वच देवतांना आपापल्या पदांपासून ही अनसूया भ्रष्ट तर करणार नाही ना असा धाक उत्पन्न झाला आणि ते भगवान विष्णूंना शरण गेले.१३. एकदा नारदमुनीनीसुद्धा त्या अनसूयेच्या पातिव्रत्य, आतिथ्य आदि धर्माचरणाचे वर्णन ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांच्यापुढे करून 'अशी सदैव अतिथींचा स्नेहाने सत्कार करणारी अनसूयेसारखी साध्वी कुणीच नाही' असे उद्गार काढले.१४. हे देवर्षींचे वचन ऐकतांच तिथे जवळच असलेल्या तिन्ही देवांच्या पत्नींचा 'विश्वात आम्हीच काय त्या पतिव्रता' असा अभिमान दुखावला आणि मत्सरामुळे झालेला संताप सहन न होऊन त्या मूर्छित झाल्या.१५. सावित्री, लक्ष्मी आणि पार्वती यांची ही अवस्था पाहून त्यांना आश्वासन देऊन ब्रह्मा-विष्णु-महेश त्वेषाने अतिथिवेष घेऊन अत्रिऋषींच्या आश्रमाला अनसूयेकडे आले. खरे तर आत्माराम ईश्वरांना अशी प्रवृत्ती होण्याचे कारणच नाही; पण स्त्रियांच्या बुद्धीने वागल्यास कसा अनर्थ होतो हे जणू जगात दाखविण्यासाठीच ते सतीच्या सत्त्वहरणाला प्रवृत्त झाले. किंवा 'अरोषात्' असा विग्रह करून स्त्रियांच्या समाधानासाठी ते निघाले तरी ते शांतपणेच 'पतिव्रता नारी ही तीर्थ आहे' ह्या स्मृतिवचनाच्या द्योतनासाठी निघाले.१६.

**पतिव्रतापि तान्दृष्ट्वा स्वाश्रमाभ्यागतान्सुरान् । प्रत्युद्गत्वा समानीय स्वासने संन्यवेशयत् ।।१७।।**
**वीजितान्कृतपच्छौचान्सूपविष्टान्जगौ सती । स्वागतं वोऽद्य किं कार्यं मुनिस्तु तपसे गतः ।।१८।।**
**त ऊचुः साध्वि नो विघ्नस्तपःसक्तमना मुनिः । कदाऽऽयातीत्यतो देहि क्षुधितेभ्योऽन्नमाश्वलम् ।।१९।।**
**इति श्रुत्वा गिरस्तेषां तथेत्युक्त्वा गृहं गता । पात्राण्यासाद्य तेभ्योऽन्नं परिविष्टं न्यवेदयत् ।।२०।।**

पतिव्रता अपि तान् स्वाश्रम+अभ्यागतान् सुरान् दृष्ट्वा प्रत्युत्+गत्वा समानीय सु+आसने संन्यवेशयत्।१७। वीजितान् कृत+पत्+शौचान् सु+उपविष्टान् (तान्) सती जगौ। वः स्वागतम्। अद्य किं कार्यम्? मुनिः तु तपसे गतः।१८। ते ऊचुः। (हे) साध्वि मुनिः तपः+सक्त+मनाः नः विघ्नः। कदा आयाति? अतो क्षुधितेभ्यः आशु अलं अन्नं देहि।१९। इति तेषां गिरः श्रुत्वा 'तथा' इति उक्त्वा गृहं गता पात्राणि आसाद्य तेभ्यः परिविष्टं अन्नं न्यवेदयत्।२०।

त्या सतीनेही त्या अतिथिवेषांतील देवांना पाहून त्यांना सामोरे जाऊन, सन्मानाने घरांत आणून आपापल्या सुशोभित आसनांवर बसविले. त्यांचे पाय धुवून ते स्वस्थ बसल्यावर त्यांना कुशलप्रश्न विचारून पंख्याने वारा घालीत ती बोलली, 'आपलं स्वागत असो! मुनिवर तर तपस्येला गेले आहेत. आपण आज आपले काय कार्य आहे ते मलाच सांगावे.' त्यावर ते देव म्हणाले, 'मन आणि इंद्रिये यांचे ऐकाग्र्य हेच परम तप सर्व धर्माहून श्रेष्ठ आहे; तोच परम धर्म आहे' (महाभारत १२.२५०.२) ह्या वचनानुसार बाह्य इंद्रिये आणि अंतःकरण यांचे समाधान (संतुलन) हे तपच ब्रह्मप्राप्तीचे द्वार आहे. ऋषिवर्यांना त्याची आवड आहे हेही आम्हाला माहिती आहे. तेव्हा ते कधी येतील काय सांगावे? आम्ही भुकेजलो आहोत. तरी तू आम्हांला लवकर (मुनींची वाट न पाहता) पुरेसं अन्न दे.'१९. हे त्यांचे बोलणे ऐकून 'ठीक आहे, जेवायला वाढते' असे म्हणून अनसूयेने स्वयंपाकघरांत जाऊन ताटांत अन्न वाढून आणले. त्यांच्यापुढे ताटे ठेवून पाणी फिरविले आणि त्यांना जेवायची विनंति केली.२०.

**त आहुः साध्वि नो देहि नग्ना भूत्वेत्यपेक्षितम् । नेदं चेद्रोचतेऽन्यत्र गच्छामः क्षुधिता इतः ।।२१।।**
**तच्छ्रुत्वापि प्रहस्यैषा ऋषेः सङ्गात्तपस्विनः । पूताया मम कामेन किं भवेच्चेत्तथाऽकृते ।।२२।।**
**शप्त्वा गच्छन्ति विमुखा महान्तोऽमी ममात्मजाः । इति स्वगतमुद्भाव्य तथेत्युक्त्वांशुकं जहौ ।।२३।।**

ते आहुः, '(हे) साध्वि, नः नग्ना भूत्वा देहि इति अपेक्षितम्। इदं न रोचते चेत् इतः क्षुधितः अन्यत्र गच्छामः।२१।' तत् श्रुत्वा अपि प्रहस्य 'तपस्विनः ऋषेः सङ्गात् पूताया मम कामेन किं भवेत्? तथा अकृते महान्ताः विमुखाः शप्त्वा गच्छन्ति। अमी मम आत्मजाः।' इति स्वगतं उद्भाव्य 'तथा' इति उक्त्वा अंशुकं जहौ।२२-२३।

त्यावर ते तिघे देव म्हणाले, 'हे सती, तू विवस्त्र होऊन आम्हांला (अन्न) वाढावेस अशी आमची इच्छा आहे. हे तुला रुचत नसेल तर आम्ही उपाशीच इथून निघून इतरत्र जाऊ.'२१. त्यावर अनसूया सती हे त्यांचे विपरीत बोलणे ऐकूनही हसली आणि मनातच विचार करू लागली, 'तपस्वी (अत्रि) मुनींच्या संगाने माझे अंतःकरण शुद्ध झाले आहे. मला कामविकाराचे काय भय?' पातिव्रत्याचा भंग करणारा कसलाही विचारच माझ्या मनात येऊ शकत नाही असा तिला आत्मविश्वास होता. अतिथिसत्काराच्या इच्छेनेसुद्धा परपुरुषासमोर नग्नावस्थेत वावरणे हे प्रायचित्ताला कारण ठरू शकेल अशीही शंका नको. *'कामोऽकार्षीत् कामः करोति नाहं करोमि, कामः कर्ता नाहं कर्ता, कामः कारयिता नाहं कारयिता'* (नारायणोपनिषत् ६१) हा मंत्र विवेकी लोकांना कामविकाराचा आत्म्याशी कांहीच संबंध नाही हेच शिकवतो; अविवेकी लोकांसाठी मात्र प्रायश्चित्ताला उपयुक्त ठरतो. तेव्हा मला कामाची काय भीती? ह्याउलट मी जर ह्यांच्या सांगण्यानुसार वागले नाही तर आम्हांला शाप देऊन हे महात्मे निघून जातील. तेव्हां *'स इद्भोज'* या मंत्रांच्या (ऋग्वेद १०.११७.३) अतिथींचा सत्कार करण्याने इष्टफल आणि न करण्याने अनिष्ट फलप्राप्तीच्या अन्वय आणि व्यतिरेकाने केलेल्या प्रतिपादनानुसार आपण ह्यांच्या मनाप्रमाणे करावे असा मनोमन निश्चय करून त्या सतीने अंगावरील वस्त्र काढून टाकले.२३.

**तदैव तेऽभवन्बाला निर्विकारा अपीश्वराः । जगत्सृडीश्वरहराः पातिव्रत्यप्रभावतः ।।२४।।**
**तान्सा तथाविधान्प्रेक्ष्य सचित्राभूद्धृतांशुका । पयः प्रसूत्या इवास्यास्तदालं स्तनतोऽस्रवत् ।।२५।।**
**सपद्येवाद्भुताविष्टा प्रेम्णा हृष्टतनूरुहा । प्रत्येकं पाययामास क्षीरं तेऽपि पपुर्मुदा ।।२६।।**
**जगदुत्पत्तिकरण-सुश्रान्त इव विश्वसृट् । पीत्वा पतिव्रतास्तन्यं परमां शान्तिमाययौ ।।२७।।**
**विश्वम्भरो विश्वरक्षा-क्रियात्रस्त इवामलम् । पतिव्रतापयः प्राश्य पीनां विश्रान्तिमाविशत् ।।२८।।**

तदा एव ते ईश्वराः जगत्+सृट्+ईश्वर+हराः अपि पातिव्रत्य+प्रभावतः निर्विकाराः बालाः अभवन्।२४। सा तान् तथाविधान् प्रेक्ष्य सचित्रा धृत+अंशुका अभूत्। तदा अस्याः स्तनतः प्रसूत्याः इव अलं पयं अस्रवत्।२५। सपदि एव अद्भुत+आविष्टा हृष्ट+तनू+रुहा प्रेम्णा प्रत्येकं क्षीरं पाययामास। ते अपि मुदा पपुः।२६। विश्व+सृट् जगत्+उत्पत्ति+करण+सुश्रान्त इव पतिव्रता+स्तन्यं पीत्वा परमां शान्तिं आययौ।२७। विश्वं+भरः विश्व+रक्षा+क्रिया+त्रस्त इव पतिव्रता+पयं अलं प्राश्य पीनां विश्रान्तिं आविशत्।२८।

तत्क्षणीच जगाची उत्पत्ति करणारा ब्रह्मदेव, नियंता विष्णू आणि संहर्ता शंकर ह्या तिघाही ईश्वरांची पातिव्रत्याच्या प्रभावाने निरागस बाळे झाली.२४. ती पतिव्रता त्या अतिथींची अशी बाळे झालेली पाहून आश्चर्यचकित झाली आणि आपली सोडलेली वस्त्रे परत नेसली. त्या वेळी नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीप्रमाणे तिच्या स्तनांतून दूधाच्या धारा सुरू झाल्या.२५. लगेच त्या आश्चर्याने थक्क झालेल्या अनसूयेला प्रेमाचे भरते आले आणि तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. एकेका बाळाला अंगावर घेऊन ती पाजायला लागली. ती बाळेही अत्यंत आनंदाने दूध पिऊ लागली.२६. जगाच्या उत्पत्तिकार्याने (जणू) थकून गेलेल्या ब्रह्मदेवाला ते पतिव्रतेचे दूध पिऊन परम शांतीचा अनुभव आला.२७. विश्वंभर विष्णू सतत विश्वाचा सांभाळ करून (जसा काही) त्रस्त झाला होता. पतिव्रतेचे दूध पोटभर पिऊन त्याला विश्रांती मिळाली.२८.

**हरस्तु विश्वसंहार-कर्मतष्ट इव क्षणात् । सत्यौधस्याशनात्तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ ।।२९।।**
**स्वधर्मज्ञाततत्सत्त्वा पाययित्वाऽपि तान्पयः । सा जगौ तत्कथोद्धातं प्रेम्णा विन्यस्य पालके ।।३०।।**
**अत्रान्तरे वनादेत्य श्रुतगीतः सतीमुखात् । सर्वं श्रुत्वेश्वरान्ज्ञात्वा ध्यानान्नत्वाऽस्तुवन्मुनिः ।।३१।।**
**विश्वसर्गस्थितिप्रान्त-निदानं विश्वसाक्षिणम् । विष्णुं विश्वमयं वन्दे विश्वाद्यं विश्वसंग्रहम् ।।३२।।**

हरः तु विश्व+संहार+कर्म+तष्ट इव सती+औधस्य+अशनात् क्षणात् तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ।२९। स्वधर्म+ज्ञात+तत्+सत्त्वा अपि तान् पयः पाययित्वा प्रेम्णा पालके विन्यस्य सा तत्+कथा+उद्धातं जगौ।३०। अत्र+अन्तरे मुनिः वनात् एत्य, सती+मुखात् सर्वं श्रुत्वा ध्यानात् ईश्वरान् ज्ञात्वा नत्वा अस्तुवन्।३१। विश्व+सर्ग+स्थिति+प्रान्त+निदानं विश्व+साक्षिणं विश्व+मयं विश्व+आद्यं विष्णुं वन्दे।३२।

विश्वसंहाराच्या कर्माने जणू रोडावलेल्या रुद्राला सतीचे स्तन्य (उधस् म्हणजे स्तन त्यापासून झालेले ते औधस्य) पिऊन पुष्टी आली आणि 'सुगंधिं पुष्टिवर्धनम्' (ऋग्वेद सं. ७.५९.१२) ह्या रुद्रमंत्रानुसार इतरांचीही पुष्टी वाढविण्याचे सामर्थ्यही त्यांच्यात आले.२९. आपल्या पातिव्रत्यधर्माच्या प्रभावाने त्या बालकांचे ईश्वरत्व जाणून, ती अनसूया त्यांना दूध पाजून, पाळण्यात घालून भक्तिप्रेमाने त्यांच्या कथा गाऊ लागली.३०. थोड्या वेळाने (आह्निक पूर्ण करून) वनाहून आलेल्या अत्रि ऋषींनी आपल्या पत्नीचे गायन ऐकले आणि तिच्याच मुखाने सर्व हकीकतही ऐकली. मग त्यांनी ध्यानाच्या प्रभावाने त्या भगवंतांना ओळखले आणि त्यांची स्तुती केली.३१. 'रजोगुणाच्या प्रादुर्भवाने विश्वाची उत्पत्ती (**सर्ग**), सत्त्वगुणाने **स्थिति** (दुष्टांचे दमन आणि साधूंचे रक्षण) आणि तमोगुणाने प्रलय (**प्रान्त**) ह्या सर्वांचे अभिन्ननिमित्तोपादानरूप आदिकारण (**निदान**) आपण आहां. विश्वाच्या आंत *'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा'* (याच्यावांचून कोणी दुसरा पहाणारा नाही) या वेदोक्तीप्रमाणे (बृ.उ. ३.७.२३) साक्षित्वाने राहूनही निर्लिप्त आहां.' *'सु'* चांगली *'पर्णं'* गति किंवा परस्पर सहाय ज्यांचे आहे असे *'सयुजौ'* सारखे *'सखायौ'* सखे *'द्वा'* दोन पक्षी, जीव आणि ईश्वर,

**तपस्तप्तं यदर्थं स त्वमेकोऽपीश लीलया । त्रिधा भूत्वात्मनात्मानं स्वैर्गुणै रमयस्युत ।।३३।।**

(हे) ईश यत्+अर्थं तपः तप्तं सः त्वं एकः अपि लीलया स्वैः गुणैः त्रिधा भूत्वा आत्मना आत्मानं रमयसि उत।३३।

*'समानं'* एकाच *'वृक्षं'* वृक्षावर ('ओव्रू छेदने' ह्या धातूपासून तत्त्वज्ञानाने छेदण्यास योग्य,) भगवद्गीतेच्या १५व्या अध्यायातील रूपकानुसार शरीराला *'परिषस्वजाते'* बिलगलेले, वसलेले आहेत. *'तयोः'* त्यांच्यापैकी *'एकः'* जीव *'स्वादु'* (कडू)गोड *'पिप्पलं'* कर्मफळे *'अत्ति'* खातो, भोगतो म्हणून (कर्म)बंधनांत सांपडतो. *'अन्यः'* दुसरा ईश्वर मात्र *'अनश्नन्नभिचाकशीति'* न खातां (चांगल्या वाईट कर्मफलांचा भोग न घेतां) केवळ साक्षित्वाने पहात असतो. (ऋग्वेद १.१६४.२०) 'असा जर मी आहे तर मग मी परिच्छिन्न आहे का?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात **विष्णुं** व्यापनशील अर्थात् सर्वव्यापी, देश, काल, वस्तु या सर्व परिच्छेदांपासून मुक्त आहां. 'असे असेल तर माझ्याहून वेगळ्या अशा या जगाची गति काय?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात, विश्वरूपी अध्यासाचा विवर्त या न्यायाने आपण विश्वाचे आद्य कारण असून आपल्यापासून वेगळे अस्तित्त्वच त्याला नाही; त्यामुळे आपण **विश्वमय** आहात. सर्प, माला, जलधारा, काठी इत्यादि भासमान रूपांना केवळ एका दोरीहून अन्य काही वास्तवता नसते त्याप्रमाणे नामरूपात्मक जगताचे आपणच एकमेव वास्तव आहांत (ऐतरेयारण्यक २.४.१). अशा आपल्याला वन्दन असो.३२. ज्या परमात्म्याच्या दर्शनासाठी मी तप आचरले तो तू एकच भगवंत लीलेने, स्वनिर्मित सत्त्व, रज आणि तम या गुणांचा अंगीकार करून ब्रह्मा, विष्णू आणि शंकर अशी तीन रूपे धारण करून आपणच आपल्याशी खेळत असतोस.३३.

**अध्यारोपापवादाभ्यां समुद्भूतं जगत्ततः । अहंममाभिमानेन पार्थक्यं त्वस्य नापरम् ।।३४।।**

जगत् अधि+आरोप+अप+वादाभ्यां समुद्भूतम्। ततः अहं+मम+अभिमानेन तु अस्य पार्थक्यं, न अपरम्।३४।

**अध्यारोप आणि अपवाद -** तुझ्या या अविकृत स्वरूपापासूनच अध्यारोपाने - अध्यासाने, जगताची सृष्टी होते. आणि त्या अध्यासाच्या अपवादाने - निराकरणाने, तो जगदाभास लय पावतो. जसा अंधारात पडलेल्या दोरीवर सापाचा **अध्यारोप** होतो आणि दिवा लावून तो संभ्रम दूर केला की तो साप नाश पावतो तसेच हे आहे. ईश्वरसृष्टीत परमात्म्याच्या मायेकडे दृष्टिक्षेपणाने - ईक्षणाने, ह्या प्रक्रियेला आरंभ होतो आणि सोळा (पांच भूते आणि अकरा इंद्रिये) अंशांच्या जड विश्वात त्याच्या प्रवेशाने ती प्रक्रिया पूर्ण होते. जीवसृष्टीत हीच प्रक्रिया जाग्रत अवस्थेपासून सुरू होऊन आत्मज्ञानाने पूर्ण होते. अशा रीतीने भासमान होणाऱ्या जगतातील देहादिक उपाधीसंबंधी 'मी' असा अभिमान, घरदार, पत्नी, पुत्र, धन पशू इत्यादिकांविषयी 'माझे' असा अभिमान हेच आपल्या अविकृत स्वरूपात भेदाचा **(पार्थक्याचा)** आभास निर्माण करतात. **तु** शब्दाने हा मिथ्या असल्याचे सूचित केले आहे. आत्मसाक्षात्काराने हे नामरूपात्मक द्वैत (**अपरं**) नाहीसे होते. देहात प्रविष्ट होऊन जन्म-मरण-जाग्रति-स्वप्न-सुषुप्तिरूप संसारचक्रांत फिरणारा जीव कधीकाळी परमेश्वराच्या कृपेने, गुरू आणि शास्त्र यांच्या प्रसादाने, हे सर्व अनुभवाला येणारे पांचभौतिक जग, त्यांतील प्राणिमात्र हे कुठून येतात, यांचे रक्षण कोण करतो आणि यांचा लय शेवटी कुठे होतो याविषयी विचार करतो. नाना शास्त्रे धुंडाळून (परोक्ष ज्ञान) हा सर्व संसार मायेने कल्पिलेला असून मिथ्या आहे असा तो निश्चय करतो. मग अपरोक्ष ज्ञानाने म्हणजेच आत्मानुभवाने ब्रह्म हेच परम सत्य आहे अशी अनुभूती घेतो. हाच **अपवाद** होय. त्यानेच परब्रह्मस्वरूप आपल्याहून वेगळे कांहीच नाही, एकच (परमात्मा) सर्वां ठायी पहावा, या जगात नानाविध असे कांही नाही अशी त्याची खात्री पटते (बृ.उ. ४:४:१९-२०). मग अशा ह्या एकमेवाद्वितीय ब्रह्माची तीन रूपे कशी झाली असे म्हणाल तर आधी सांगितल्याप्रमाणे केवळ स्वतःच्या मनोरंजनासाठी केलेली ती एक लीला आहे. माझ्याच घरी

**इति स्तुवति तस्मिंस्ते पालके बालरूपतः । स्थिता अप्याद्यरूपैः स्वैः स्थित्वोचुस्तं वरं वृणु ।।३५।।**
**स प्राह साध्वीं सुभगे ब्रह्मविष्णुमहेश्वराः । त्वद्भक्त्याप्ता मनोदूरा अतोऽभीष्टं वरं वृणु ।।३६।।**

इति तस्मिन् स्तुवति ते बाल+रूपतः पालके स्थिता अपि स्वैः आद्य+रूपैः स्थित्वा ऊचुः,'वरं वृणु'।३५। सः प्राह, '(हे) साध्वि, सुभगे, त्वत्+भक्त्या मनो+दूराः ब्रह्म+विष्णु+महेश्वराः आप्ताः। अतः अभीष्टं वरं वृणु।'।३६।

का याचे उत्तरही पूर्वीच्या लोकांत मी केलेले तप असे आले आहेच. जगात आपली भक्तवशता प्रकट करण्यासाठी, माझ्या तपाचे निमित्त करून आपण अवतरला आहांत. वास्तविक आपला कुणी अन्य निर्माता नाही (**निमित्त कारण**) की इतर कशापासून (**उपादान**) आपली उत्पत्ती नाही. आपणच भगवद्गीतेत सांगितल्यानुसार (२:२०) जन्ममरणादि विकार आपल्याला स्पर्शू शकत नाहीत. केवळ भक्तांवर कृपा करण्यासाठीच आपण स्वेच्छेने अवतार धारण करता.३४.

याप्रमाणे अत्रि महर्षी स्तुति करीत असतांनाच, पाळण्यात बालरूपांनी तसेच राहून ते तीनही भगवंत आपल्या मूळ रूपांनी मुनींसमोर उभे राहिले; आणि त्यांना 'इष्ट वर मागून घ्या,' असे म्हणाले.३५. याप्रमाणे त्या त्रैलोक्यवंदित देवांना आपल्यासमोर उपस्थित होऊन असे बोलतांना ऋषिवर्यांनी 'हा अनसूयेच्या पातिव्रत्याचाच प्रभाव आहे,' असा विचार करून ते त्या सतीला म्हणाले, 'हे सौभाग्यवती (ईश्वरांचे मातृत्व तिला प्राप्त झाल्याने हे संबोधन आहे), मनाला सुद्धा दुर्गम असे ब्रह्मा-विष्णू-महेश तुझ्या भक्तीने आपल्या घरी आले आहेत. (हे पार्था, तो परमपुरुष केवळ अनन्य भक्तीनेच लाभतो ह्या वचनानुसार (भ.गी. ८:२२) भक्तीच मुख्य कारण आहे.) तरी तू तुला हवा असलेला वर मागून घे.'३६.

**साऽप्याह सुतपः सृष्ट्यै त्रिधाभूतेन वै भवान् । सृष्टोऽमुनामुमेवातः पुत्रत्वेन वृणोत्वजम् ।।३७।।**
**ऋषिः सोऽपीदमेवेष्टं मत्वा वव्रे तदेव हि । विष्णुः सर्वात्मनाऽहं ते मया दत्तः किलाब्रवीत् ।।३८।।**
**पतिव्रताप्रभावोऽयं बाला भूत्वेश्वराः स्थिताः । स्वस्वप्राग्रूपतोऽप्येते स्वं स्वं स्थानं ययुस्त्रयः ।।३९।।**

सा अपि आह, '(हे) सुतप, त्रिधा+भूतेन अमुना सृष्ट्यै वै भवान् सृष्टः। अतः अमुं अजं एव पुत्रत्वेन वृणोतु'।३७। सः ऋषिः अपि इदं एव इष्टं मत्वा तत् एव हि वव्रे। विष्णुः अब्रवीत्, 'अहं सर्व+आत्मनः मया ते दत्तं किल'।३८। अयं पतिव्रता+प्रभावः। ईश्वराः बालाः भूत्वा स्थिताः अपि एते त्रयः स्व+स्व+प्राक्+रूपतः स्वं स्वं स्थानं ययुः।३९।

हे महर्षींचे वचन ऐकून 'हा खरोखर आपल्या पतीच्या तपाचाच प्रभाव आहे, माझी भक्ती आणि पातिव्रत्य यांचे काय महत्त्व?' असा विचार करून ती नम्रपणे बोलली, 'हे श्रेष्ठ तपस्विन्! (अत्रिमुनींचे तप ईश्वरोद्देशाने आणि सात्त्विकतेने केलेले असल्याने त्यांत कसलाही दोष (किल्मिष) नसल्याने इथे त्याला सुंदर (सात्त्विक) तप असे म्हटले आहे.) तीन रूपे धारण करणाऱ्या या परमेश्वरानेच आपल्याला प्रजोत्पादनासाठी निर्माण केले आहे. तरी जन्मादि भावातीत त्रयमूर्ति भगवंतालाच आपण पुत्ररूपाने मागून घ्यावे.' पुत्र हा गौण आत्माच असल्याने त्या रूपाने अवतरलेल्या भगवंताच्या कोड-कौतुक, आलिंगन-चुंबन इत्यादींनी मुख्य आत्म्याची प्राप्ती सुलभ व्हावी हाच त्या साध्वीचा भाव होता.३७. ऋष् म्हणजे गती. ज्याची अतीत (भूत), अनागत (भविष्य) आणि वर्तमान ह्या सर्व काळांत गती आहे, जो हे सर्व जाणूं शकतो तो **ऋषी**. अशा त्या अत्रि ऋषींनाही हे आपल्या पत्नीचे म्हणणे पटले आणि त्याप्रमाणे त्यांनी तोच वर (तीनही देवांनी आपले पुत्र व्हावे असा) मागून घेतला. त्यावर त्या सर्वव्यापी भगवंताने 'मी माझे स्वतःचे पूर्णत्वाने तुला दान करतो,' अशा शब्दात ते मान्य केले.३८. अशा रीतीने ते ब्रह्मा-विष्णू-महेश बालकांच्या रूपाने अनसूयेच्या पाळण्यात राहून आपल्या मूळ रूपांनी आपापल्या स्थानी - अनुक्रमे सत्यलोक, वैकुंठ आणि कैलास या लोकांना निघून गेले.३९.

**पृथङ्नामानि बालेभ्यो ददौ तेभ्योऽर्थविन्मुनिः । पूर्णत्वेन मयाऽहं ते दत्त इत्युक्तवान् स्वयम् ।।४०।।**
**भगवानिति नाम्नैनं मुनिर्दत्तं चकार सः । ब्रह्मांशं चन्दनाच्चन्द्रमौग्रं दुर्वाससन्तथा ।।४१।।**
**त्रयाणामप्ययं साक्षाद्दत्तस्तु भगवान्स्वयम् । श्रुत्यन्विष्टाङ्घ्रब्जरेणुः सच्चिदानन्दविग्रहः ।।४२।।**
**सदेष्टयोगसंविद्दः स्मर्तृगामी क्षणे क्षणे । चण्डोऽप्यन्योऽनुग्रहाशीश्चन्द्रो जननवर्धनः ।।४३।।**

अर्थ+वित् मुनिः तेभ्यः बालेभ्यः पृथक् नामानि ददौ। स्वयं भगवान्, 'अहं मया पूर्णत्वेन ते दत्तं' इति उक्तवान्।४०। एनं मुनिः नाम्ना दत्तं चकार। सः ब्रह्म+अंशं चन्दनात् चन्द्र तथा औग्रं दुर्वाससम् (नाम्ना चकार)।४१। त्रयाणां अपि दत्तः तु स्वयं श्रुति+अन्विष्ट+अङ्घ्रि+अब्ज+रेणुः सत्+चित्+आनन्द+विग्रहः साक्षात् स्वयं भगवान्।४२। सदा इष्ट+योग+संवित्+दः क्षणे क्षणे स्मर्तृगामी। अन्यः चण्डः अपि अनुग्रह+आशीः। चन्द्रः जनन+वर्धनः।४३।

नंतर शब्दांचे अर्थ जाणणाऱ्या त्या अत्रिमुनींनी त्या बालकांना त्यांच्या त्यांच्या गुणांची द्योतक अशी नावे दिली. 'मी सर्वांशाने तुला दिले आहे **(दत्तम्)**' असे म्हणणाऱ्या विष्णूंच्या अंशाला त्यांनी **दत्त** असेच नाव दिले. '*दत्तात्मा तु स्वयं दत्त*' असे याज्ञवल्क्यस्मृतीचे वचन आहे (व्यवहाराध्याय श्लोक १३१). अशीच शुनःशेपाला विश्वामित्राने दत्तक घेतल्याची गोष्ट आहे. पण तिथे शुनःशेपाचा पहिला जनक पिता होता त्यामुळे त्याला *'कृत्रिम वैश्वामित्र'* असे म्हणतात. हे दोन पित्यांचे *'द्व्यामुष्यायण'* दत्ताच्या ठिकाणी लागू होत नाही. कारण भगवान विष्णूंचा आधी कुणी पिता नव्हता. तसेच गोत्रप्रवरादि अस्तित्वातच नव्हते. ब्रह्मादेवाच्या अंशाला त्याच्या आल्हादकतेमुळे **(चंदन)** चंद्र असे नामाभिधान केले. तसेच उग्रस्वभावाच्या भगवान शंकाराच्या अंशाला **दुर्वास** असे नाव दिले.४०-४१. ह्या तिघांतही स्वतः दत्त, ज्याच्या पदकमलाच्या परागकणांचा श्रुति निरंतर शोध घेताहेत (पण ज्याना ते अजून सांपडले नाहीत) असा सच्चिदानंदस्वरूप साक्षात् परमेश्वर आहे. पदकमलाचे परागकण या शब्दाने जगताच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा निर्देश आहे, हे परब्रह्माचे *'तटस्थलक्षण'* आहे. सत्, चित् आणि आनंद यांनी परब्रह्माचे *'स्वरूपलक्षण'* सुचविले आहे. हा दत्त सदैव अभीष्ट, अष्टांगयोग आणि ज्ञान यांचा दाता आहे आणि स्मरताक्षणी दर्शन देणारा आहे. दुर्वासमुनि रागीट स्वभावाचे असले तरी इतरांवर अनुग्रह करण्याचाच त्यांचा स्वभाव आहे. आणि चंद्र वंशवर्धक तसाच लोकांचे पोषण करणारा आहे.४२-४३.

**दुर्वासःशापमाश्रुत्य भूदेवार्थमनन्तशः । धृत्वावतारान्कार्यान्ते लीलाकायान्जहात्यजः ।।४४।।**
**परानुग्रहकार्यार्थमवतीर्णः स्वयं किल । दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वान्नामुमत्यजत् ।।४५।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कुतो दुर्वाससा शप्तः शापोऽव्यक्ते कथं वद । लग्नः परावरेऽमुं मे संशयं छेत्तुमर्हसि ।।४६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्ताधीनतया त्वेष भगवान् भक्तिभावनः । अव्यक्तोऽप्यस्ति सुव्यक्तः पूर्णाऽतोऽत्र सहिष्णुता ।।४७।।**

दुर्वासः शापं आश्रुत्य, अजः भू+देव+अर्थं अनन्तशः अवतारान् धृत्वा कार्य+अन्ते लीला+कायान् जहाति। पर+अनुग्रह+कार्य+अर्थं स्वयं किल अवतीर्णः। दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वात् अमुं न अत्यजत्।४४-४५। नामधारक उवाच। कुतो दुर्वाससा शप्तः? अव्यक्ते परावरे शापः कथं लग्नः? अमुं मे संशयं छेत्तुं अर्हसि।४६। एष भक्ति+भावनः भगवान् भक्त+अधीनतया अव्यक्तः अपि सुव्यक्तः अस्ति। अतः अत्र पूर्णा सहिष्णुता।४७।

दुर्वासमुनींच्या शापाचा अंगीकार करून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठी आणि देवांच्या कार्यासाठी हा अजन्मा अपरिमित अवतार धारण करतो आणि ती ती कार्ये झाल्यावर त्या त्या लीलाविग्रहांचे विसर्जन करतो. मात्र इतरांच्या अनुग्रहासाठी - मुमुक्षूंना मोक्षाची वाट दाखविण्यासाठी, भगवान विष्णूंनी स्वतः धारण केलेल्या ह्या दत्तावताराचे कार्य मात्र नित्य - न संपणारे असल्याने तो चिन्मय देह मात्र त्यांनी टाकलेला नाही.४४-४५. नामधारक प्रश्न करतात की 'ह्या कोणत्याही लक्षणानी अभिव्यक्तीला न येणाऱ्या आणि ब्रह्मादिकसुद्धा ज्याच्याहून निकृष्ट आहेत अशा परमात्म्याला दुर्वासांचा शाप लागला कसा हा माझा संशय आपणच फेडूं शकतां.'४६. सिद्ध म्हणाले, 'हा भगवान भक्तांच्या अधीन आहे. त्यामुळे वस्तुतः अव्यक्त असलेला हा भगवंत दया, क्षमा, शांती इत्यादि सर्व लक्षणे धारण करून व्यक्त होतो. त्यामुळेच भक्तवात्सल्याने त्याच्यात पूर्ण सहिष्णुता असते. भक्तांचे सर्व अपराध तो पोटात घेतो. प्रसंगी भक्ताचे क्लेश स्वतःवर घेतो पण त्यांना त्यांची झळ लागूं देत नाही.'४७.

**पुराम्बरीषनामैको भक्तो भागवतोत्तमः । एकादशीव्रतपर आसीदभ्यागतार्चकः ।।४८।।**
**एकदा व्रतभङ्गाय पारणाहे तदालयम् । चण्डः प्राप्याह दुर्वासा भोजनं मेऽर्पयेति च ।।४९।।**
**दास्यामीत्युक्तवत्यस्मिन्गत्वा स्नातुं नदीमरम् । छिद्रान्वेषी तत्र तस्थौ तरितुं पारणाक्षणम् ।।५०।।**
**सोऽप्यभुक्ते मुनौ भोज्यं नान्यथा व्रतभङ्गभीः । तीर्थात्तूभयसिद्धिर्मे इति मत्वा पपौ जलम् ।।५१।।**

पुरा अम्बरीष नाम एकः भागवत+उत्तमः एकादशी+व्रत+पर अभ्यागत+अर्चकः आसीत्।४८। एकदा चण्डः दुर्वासा पारणा+अहे व्रत+भङ्गाय तत्+आलये प्राप्य च आह, 'मे भोजनं अर्पय' इति।४९। अस्मिन् 'दास्यामि' इति उक्तवत् स्नातुं अरं नदीं गत्वा छिद्र+अन्वेषी तत्र पारणा+क्षणं तरितुं तस्थौ।५०। सः, 'मुनौ अभुक्ते न भोज्यं, अन्यथा व्रत+भङ्ग+भीः, तीर्थात् तु मे उभय+सिद्धिः' इति मत्वा जलं पपौ।५१।

पूर्वी अम्बरीष नांवाचा एक राजर्षि उत्तम भागवत (भगवद्भक्त) होता. आपल्या अंतरांत आणि सर्व भूतमात्रांत भगवंताचे दर्शन करणारा आणि आपल्यासह सर्व चराचर भगवंताच्या ठायीं आहे असे पाहणारा भागवतोत्तम होय. (*'सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः। भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः।।'* श्रीमद्भागवत ११:२:४५) तो निष्ठेने एकादशीव्रत करीत असे. दशमीला एकभुक्त राहून संकल्प करायचा, एकादशीला पूर्ण दिवसभर उपोषण करायचे आणि द्वादशीला नियत वेळेला पारणा करून पुनः उरलेल्या दिवसभर उपोषण करायचे असे ते व्रत. असे तीन दिवसांचे व्रत तो करीत असे. तसाच त्याचा घरी आलेल्या अतिथीला जेवण घालण्याचाही नियम होता.४८. एकदा त्याच्या व्रताचा भंग करण्याच्या हेतूने संतापी दुर्वासमुनी द्वादशीच्या दिवशी पारण्याला मुहूर्तभर (दिवसाचा ३0वा भाग; ४८ मिनिटे) असतांना आले आणि त्यांनी भोजनाची मागणी केली.४९. अम्बरीषाने ते मान्य केल्यावर ते स्नानासाठी नदीवर गेले. तिथे मुद्दामच पारण्याची वेळ टळावी ह्या हेतूनेच अंबरीषाच्या व्रतातील न्यून (छिद्र) शोधणाऱ्या ऋषींनी हत्तीप्रमाणे स्नान करीत विलंब केला.५०. इकडे मुनींना सोडून जेवता येत नाही आणि पारण्याचा मुहूर्तही चुकूं नये अशा शृंगापत्तीत सांपडलेल्या अंबरीषाने फक्त तीर्थजल प्राशन केले.५१.

**तदैत्याह मुनिः पीतं हित्वा मां क्षुधितं यतः। दुर्भगानेन दोषेण भ्रमिष्यसि भवे भवे ।।५२।।**
**इत्युक्तः सोऽप्यजं भीतो दध्यौ स्वकुलदैवतम् । स्वदासजीवनं विष्णुं सोप्यागत्याह तं मुनिम् ।।५३।।**
**मुने मोघं न ते वाक्यं शापं देहि तमेव मे । नायं सोढुं प्रभुर्भक्त-वात्सल्यान्मे सहिष्णुता ।।५४।।**

तदा मुनिः एत्य आह, '(हे) दुर्भग यतः मां क्षुधितं हित्वा पीतं, अनेन दोषेण भवे भवे भ्रमिष्यसि।'।५२। इति उक्तः सः अपि भीतः स्वकुलदैवतं अजं दध्यौ। स्वदासजीवनं विष्णुः सः अपि आगत्य तं मुनिं आह।५३। '(हे) मुने ते वाक्यं मोघं न। तं एव शापं मे देहि। अयं न सोढुं, मे भक्त+वात्सल्यात् सहिष्णुता।'।५४।

त्याच वेळी नदीहून परतलेल्या मुनींनी ते ओळखून त्याला शाप दिला. 'अरे करंट्या, मला उपाशी ठेवून जेवलास त्या पापाने तू पुनःपुन्हा विविध योनीत (मत्स्य, कूर्म, वराह, सिंह इत्यादि) जन्म घेऊन फिरत राहशील.' इथे कठोपनिषदातील मंत्राचा (१.१.८) निर्देश महाराजांनी केला आहे. ज्याच्या घरून ब्राह्मण उपाशी जातो असा दुर्बुद्ध, आपल्या आशा-अपेक्षा, सत्संग आणि आनंद, इष्टपूर्तादि पुण्यांचे फळ या सर्वांना मुकतो. यासाठी कोणत्याही परिस्थितीत अतिथीची उपेक्षा करू नये हाच या मंत्राचा भावार्थ आहे.५२. ह्या शापाने आता आपण पशुयोनीत गेल्याने आपल्याला भगवंताचे स्मरण राहणार नाही ह्या भयाने कासावीस झालेल्या त्या भागवतोत्तमाने आपले कुलदैवत भगवान विष्णू यांचे ध्यान केले. श्रीहरीही तत्क्षणी तिथे प्रकट झाले आणि दुर्वास ऋषींना म्हणाले,५३. 'ऋषि महाराज, आपल्या तपाच्या सामर्थ्याने आणि आपण सत्यसंकल्प असल्याने आपले वचन कधीच वाया जाणार नाही. पण हा एवढा भयंकर शाप ह्या माझ्या भक्ताला सोसणार नाही. अहो, हा तर मलाही सहन करणे दुरापास्त आहे; पण भक्तवात्सल्याने मी तो सोशीन. तेव्हां आपण तो शाप मलाच द्यावा.'५४.

**इत्याकर्ण्य मुनिर्मत्वा भुव्ययं दुर्लभो नृणाम् । अम्बरीषप्रभावेण शापसम्बन्धकारणात् ।।५५।।**
**भविष्यत्यत्र सुलभस्तच्छपाम्येनमित्यसौ । तं शशापाप्यजः शापाद् बहुधावतरत्यजः ।।५६।।**

इति आकर्ण्य मुनिः 'अयं भुवि नृणां दुर्लभः। अम्बरीष+प्रभावेण शाप+संबन्ध+कारणात् अत्र सुलभः भविष्यति। तत् एनं शपामि।' इति मत्वा असौ तं शशाप। अजः शापात् बहुधा अवतरति।५५-५६।

हे ऐकून दुर्वासांनी 'हा भूलोकातील मानवांना तपादि कठीण उपायांनीसुद्धा भेटत नाही. अंबरीषाच्या भक्तीसाठी आणि शापाच्या निमित्ताने हा ह्या भूलोकी सुलभ होईल. तरी मी यालाच हा शाप देतो,' असा विचार करून भगवंताला शाप दिला. आणि जन्मादि विकारांच्या अतीत असूनही नारायणाने मत्स्य, कूर्म इत्यादि रूपांनी पृथ्वीवर अवतार धारण केले.

विष्णूचे मत्स्यादि अवतार पुराणांतून वर्णिलेले आहेत.

१. चैत्र शुक्ल तृतीयेच्या अपराह्ण (माध्याह्नोत्तर) काळी मत्स्य रूपाने अवतरून समुद्रात बुडलेले वेद वर काढून मनूचे रक्षण केले.

२. वैशाखी पौर्णिमेला सायंकाळी कासवाचे रूप घेऊन समुद्रमंथनासाठी मंदार पर्वत पाठीवर घेतला. ३.

भाद्रपद शुक्ल तृतीयेच्या अपराह्णी वराहरूपाने समुद्रांतून पृथ्वी वर काढून हिरण्याक्षाचा संहार केला.

४. वैशाख शुक्ल चतुर्दशीला नरसिंहरूपाने अवतरून हिरण्यकश्यपूचा नाश केला.

५. भाद्रपद शुद्ध द्वादशीला माध्याह्नकाली वामनाचे रूप घेऊन कपटाने असुरराज बलीचे बंधन केले.

**अस्यावतारा मत्स्याद्याः पुराणोक्ता हि विश्रुताः । द्विवारमाविरासीत्स दीनान्त्रातुं जनान् कलौ ।।५७।।**
**अद्यापि तौ कामदौ स्तः पामरागोचरौ कलौ । यतकालकलौ द्राक्शं सिद्ध्येन्नान्यदतोऽवितः ।।५८।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

अस्य मत्स्य आदि पुराण+उक्ताः अवताराः हि विश्रुताः। कलौ दीनान् जनान् त्रातुं द्विवारं आविरासीत्।५७। कलौ पामर+अगोचरौ तौ कामदौ अद्यापि स्तः। यत+काल+कलौ शं द्राक् सिद्ध्येत् न अन्यत्। अतः (सः कलिः।) अवितः।५८।

६. वैशाख शुक्ल तृतीयेच्या माध्याह्नकाली कार्तवीर्यादि क्षत्रियांचा संहार करण्यासाठी परशुराम भार्गवाचा अवतार घेतला.

७. चैत्र शुक्ल नवमीला दशरथाच्या पोटी रामाचा अवतार घेऊन रावणाचा कुळासहित नाश केला. ८.

श्रावण कृष्ण अष्टमीला मध्यरात्री अवतरून श्रीकृष्णाने भूमीचा भार हलका केला. ९. आश्विन शुक्ल दशमीला बुद्धाचा अवतार घेऊन कारुण्याचा प्रसार केला. १०. श्रावण शुक्ल षष्ठीला कल्कीचा जन्म होईल आणि तो म्लेच्छांचा नाश करील. हे दहा अवतार होत.५५-५६. कलियुगांत झालेल्या अवतारांविषयी पुढच्या श्लोकांत सांगितले आहे.

मार्गशीर्ष पौर्णिमेला प्रदोषकाळी बुधवारी मृगनक्षत्रावर श्रीदत्तात्रेयांचा अवतार आजही गाजतो आहे. ह्या दत्तप्रभूंचेच श्रीपाद आणि नरहरि या नांवांचे दोन अवतार कलियुगांतील दीनदुबळ्यांच्या उद्धारासाठी झाले आहेत. पामरांना दिसत नसले तरी ते आजही ते भक्तांच्या कामना पूर्ण करीत विद्यमान आहेत.

(तर मग ते सकल दोषांनी भरलेल्या या क्रूर कलीचा नाश का करीत नाहीत ही शंका अपेक्षून सांगत आहेत.)

ब्रह्मदेवाच्या योजनेने त्याला नेमून दिलेल्या काळाचा विचार करून आणि त्या युगांत पुण्याचा लाभ सुलभ आणि लवकर (केवळ संकल्पाने) होत असल्याने तसेच संकल्पाने पाप मात्र लागत नसल्याने तो कितीही दुष्ट असला तरी त्याला राखला आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तिसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अध्याय ४ ।।

## ।। यदुरुवाच ।।

**श्र्यायुःकीर्त्यृद्धिहेतुर्ना न्नर्थसक्तोऽन्यथा भवान् । कल्पः स्वङ्गो ज्ञोऽप्यकर्ता कुतोऽत्रातृट् समुत्विति ।।१।।**

ना श्री+आयुः+कीर्ति+ऋद्धि+हेतुः नृ+अर्थ+सक्तः। भवान् अन्यथा। कल्पः सु+अङ्गः ज्ञः अपि अकर्ता, अतृट्, अत्र कुतः समुत् इति।१।

(श्रीगुरुचरित्राला अभिप्रेत दत्तसंप्रदायाची मूलतत्त्वे विस्ताराने मांडून त्याची सांगड श्रीमद्‌भागवत संप्रदायाशी घालण्याचे कार्यही श्रीस्वामिमहाराजांनी प्रस्तुत ग्रंथाद्वारे केले आहे. त्यासाठी आवश्यक तेथे श्रीगुरुचरित्रात नसलेल्या विषयांचा समावेश त्यांनी ह्या द्विसाहस्री गुरुचरितम् ग्रंथात केला आहे. अर्थात् हे विषय आगंतुक आहेत ही जाणीव असल्याने त्या त्या ठिकाणी त्या लोकांना त्यांनी 'क्षेपक' म्हटले आहे. हा संपूर्ण चौथा अध्याय मूळ गुरुचरित्रात नाही. त्यामुळे त्यांनी त्याला क्षेपकोऽध्यायः असे म्हटले आहे. मूळ गुरुचरित्रात श्रीदत्तजन्माची कथा सोडून इतर दत्तचरित्राचा फारसा उल्लेख आढळत नाही. श्रीगुरु नृसिंहसरस्वतींना त्रयमूर्ति असे विशेषण गुरुचरित्रात बऱ्याच ठिकाणी लावले आहे तेवढेच.

दत्तावताराच्या कार्याची, तत्त्वज्ञानाची आणि उपासनापद्धतीची संगती गुरुचरित्रातील प्रतिपादनाशी लावून त्याला बळकटी देण्याचे कार्य प.प. श्रीटेंबेस्वामिमहाराजांनीच प्रथम केले आहे. द्विसाहस्रीतील हा चौथा क्षेपक अध्याय त्या कार्याला पायाभूत आहे. ह्या अध्यायांतील ३ ते ४० हे ३८ लोक जसेच्या तसे श्रीदत्तपुराणात (६:५:९-४६) आणि श्रीदत्तात्रेयषोडषावतारचरित्रात (१५:८-४५) दिले आहेत. ह्या ३८ लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणाच्या टीकेत **'श्रीअवधूतगीता'** असे नांव दिले आहे. ह्या आख्यानावर श्रीमद्‌भागवतांतील एकादश स्कंधांतील ७व्या अध्यायातील यदु-अवधूत संवादाची छाप स्पष्टपणे दिसून येते. - अनुवादक)

**श्रीदत्तो यदुना पृष्टस्तं पुंसां श्रेयसेऽब्रवीत् । परं ध्युपाश्रितगुरु-शिक्षितज्ञानमात्मनः ।।२।।**

श्रीदत्तः यदुना पृष्टः तं पुंसां श्रेयसे आत्मनः परं धी+उपाश्रित+गुरु+शिक्षित+ज्ञानं अब्रवीत्।२।

श्रीगणेशाय नमः। चतुर्थाध्याय. आत्मविद्येचे निरूपण करण्यासाठी त्याला पुष्टी देणारे असे ब्रह्मज्ञानाचे उपदेशात्मक उपाख्यान ह्या अध्यायात सांगितले आहे. हे ब्रह्मसूत्रातील पारिप्लवाधिकरणाला (११:४:२३) अनुसरूनच आहे. उपनिषदांत याज्ञवल्क्य-मैत्रेयी, प्रतर्दन, जनश्रुति इत्यादींच्या अनेक कथा (उपाख्याने) सांगितल्या आहेत. ह्यासंबधी कुणी असे म्हणेल की ह्या अश्वमेधादि यज्ञात ऋत्विजांनी यजमानाला मधूनमधून कांही कथा सांगण्याचे विधान आहे. ह्या कथा केवळ त्या विधीचा भाग म्हणजे उपचारात्मक असतात. त्याला परिप्लव म्हणतात. त्याचप्रमाणे उपनिषदात आलेल्या ह्या गोष्टी औपचारिक मानायच्या काय? असा प्रश्न (पूर्वपक्ष) उपस्थित करून ह्या अधिकरणात त्याचे नकारार्थी उत्तर दिले आहे. पुढे असे स्पष्ट केले आहे की या कथा आत्मविद्येच्या प्रतिपादनाशी संबंधित असून त्याचा अंगभूत घटक आहेत. श्रीस्वामिमहाराजांना इथे हे सुचवायचे आहे की यदु आणि अवधूत यांची ही कथाही ह्या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय जो आत्मज्ञान त्याचाच परिपोष करीत आहेत. पर्यायाने श्रीगुरुचरित्रात आलेल्या सर्वच गोष्टी आत्मज्ञानाच्या उपदेशाचाच भाग आहेत असे सुचविले आहे. त्यांच्याकडे केवळ कांही प्रसंगोपात्त कथा असे न पाहता त्यांतील निर्दिष्ट तत्त्वज्ञानाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. **चोवीस गुरूंकडून शिकलेले ज्ञान। यदुराया अवधूत निरूपी जाण। तेवींच प्रल्हाद आणि अर्जुन। बोधिले अनसूयानंदने।।४।।** पित्याच्या शापाने वडिलोपार्जित राज्यापासून वंचित झालेला ययातिपुत्र यदु विरक्त होऊन वनांत संचार करीत असतां त्याने एका निर्मनुष्य स्थानी एका सर्वसंगपरित्याग केलेल्या, एका ब्राह्मण अवधूताला भूमीवर झोपलेले पाहिले. तिथे निश्चिंत, भयरहित आणि तरीही सावध (अंतर्मुख) अशा त्या अवधूताला पाहून यदुने आश्चर्याने त्याला प्रश्न केला.

**न दैवानुगभूतार्तः क्ष्मेव धीरः सृतेश्चलेत् । सदा परार्थोद्भवेहो नगाच्छिक्षेत्परात्मताम् ।।३।।**

दैव+अनुग+भूत+आर्तः क्ष्मा+इव धीरः सृतेः न चलेत्। पर+अर्थ+उद्भवः नगात् परात्मतां शिक्षेत्।३।

'महाराज! साधारणतः मानवाची प्रवृत्ती संपत्ती, आयुष्य, कीर्ती यांच्या समृद्धीसाठी धर्म, अर्थ, काम आदि पुरुषार्थाकडे असते. आपल्याला मात्र ह्या कशाचीही इच्छा दिसत नाही. तसेच आपण धर्मादि पुरुषार्थाविषयी उदासीन आहां. आपण धडधाकट, ज्ञानी आणि हुषार दिसता. तेव्हा आपल्यात कर्तृत्वच नाही असेही नाही. आपण निरिच्छपणे, पत्नी, पुत्र इत्यादि कांहीच संसार नसूनही पूर्ण आनंदात इथे पहुडलेले दिसतां. हे कसे काय?'

ययातिपुत्र यदूचा हा प्रन ऐकून श्रीदत्तप्रभूंनी आपल्याच बुद्धीने स्वीकारलेल्या चोवीस गुरूंपासून प्राप्त केलेले हेय आणि उपादेय - म्हणजेच त्याज्य आणि ग्राह्य असे दोन्ही प्रकारचे भ्रम आणि प्रमाद यांचा निरास करणारे उत्कृष्ट ज्ञान मानवांच्या उद्धारासाठी सांगायला आरंभ केला. *'सन्ति मे गुरवो राजन् बहवो बद्ध्युपाश्रिताः। यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु।।'* (भा.पु. ११:७:३२)

**१. पृथ्वी -** त्यांतही तितिक्षेचे परमार्थमार्गातील प्राधान्य लक्षात घेऊन आधी पृथ्वीपासून घेतलेली शिकवण सांगतात. आपापल्या कर्माला अनुसरून पृथ्वीवर वावरणारे जीव तिच्यावर सतत आघात करीत असतात; खणणे, नांगरणे, मलमूत्रादि विसर्जणे, पायाने तुडविणे इत्यादि नानाप्रकारे तिला सतत हे सर्व प्राणीमात्र त्रस्त करीत असतात. पण पृथ्वी मात्र त्या सर्वांना आधार देत आपल्या मार्गावर अविचल राहते. 'हे सर्व जीव आपापल्या दैवाप्रमाणे घडलेले आहेत आणि त्याचप्रमाणे ते वागतात. तेव्हां कुणाला काय म्हणून दोष द्यावा?' असा विचार ती करते. पृथ्वीपासून हे धैर्य आणि क्षमाशीलता मी शिकलो आहे. शास्त्रांत तीन प्रकारचे प्रारब्ध सांगितले आहे. स्वेच्छा प्रारब्ध, परेच्छा प्रारब्ध आणि अनिच्छा प्रारब्ध. यापैकी कोणत्याही प्रकारे समोर येणारे प्रारब्ध हे आपलेच कर्म आहे असा विचार करून कुणावरही राग धरू नये.

**प्राणवृत्त्याक्षिप्तहृद्वाग्विद्भृत्तुष्येन्न गोप्रियैः । तद्भुग्दोषगुणास्पृग्वि-धर्मासक्तश्च देहगः ।।४।।**

वित्+भृत् प्राणवृत्त्या अक्षिप्त+हृत्+वाक् तुष्येत्, न गो+प्रियैः। देह+गः तत्+भुक् वि+धर्म+असक्तः दोष+गुण+अस्पृक् गुण+आश्रयः स्वदृक्, गन्धैः वायुवत् गुणैः न युज्येत्।४।

**नग** पृथ्वीचेच अंगभूत असे जे पर्वत किंवा वृक्ष, त्यांच्यापासून इतरांच्या सुखासाठीच सर्वस्व वेंचायला मी शिकलो. **पर्वत** आणि वृक्ष यांची उत्पत्तीच जणू परोपकारासाठी झालेली असते. पर्वत आपली माती, जल, खनिज, रत्नादि संपत्ती इतरांसाठीच देतात. त्याचप्रमाणे **वृक्ष**ही त्यांना लावणारा, तोडणारा, अथवा उपटून टाकणारा असा जो कोणी त्यांचा आश्रय घेतो त्याला आपली पाने फुले, फळे, छाया आणि लाकूडसुद्धा निरपेक्षपणे अर्पण करतात. (जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयाने केली। दोघां एकचि साउली। वृक्ष दे जैसा।। ज्ञानेश्वरी १:१९९). *'भूतैराक्रम्यमाणोऽपि, धीरो दैववाशनुगैः। तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम्।। शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः। साधुः शिक्षेत भूभृत्तौ, नगशिष्यः परात्मताम्।।'* भा.पु. ११:७:३७-३८.

**२. वायू -** क्षमाशील मनुष्याला आंतरिक शांती लाभते हे खरे असले तरी मनाला विषयांची ओढ असेल तर ते बहिर्मुख होण्याचीच शक्यता आहे. चित्ताला अंतर्मुखता येण्यासाठी देहाच्या आंतील आणि बाहेरील वायूपासून घेतलेले विषयांसंबंधी अनासक्तीचे शिक्षण सांगतात. शरीरांतील प्राणवायू जसा चव-बेचव असा विचार न करता जे अन्न मिळेल त्यावर निर्वाह करतो त्याचप्रमाणे शहाण्या माणसानेही मिळेल त्या आहाराने समाधान मानून रुचीकडे लक्ष देऊं नये. जिभेचे चोचले पुरवण्याची धडपड करून मनाचा क्षोभ होऊ देऊ नये. प्राणवृत्तीचा अवलंब करून आहार घेतला नाही तर मनाला विकलता येईल आणि ज्ञान टिकवता येणार नाही; रुचीचा आग्रह धरला तर मन आणि वाचा अशांत होतील. (*'प्राणवृत्त्यैव संतुष्येन्मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः। ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः।।'* भा.पु. ११:७:३९।।)

**गुणाश्रयो गुणैर्युज्येत्र गन्धैर्वायुवत्स्वदृक् । कालोत्थगुणतेजोऽब्भू-मयभावास्पृगित्पुमान् ।।५।।**
**वायूत्थाब्दास्पृक्खवच्चान्तःस्थेनाभिदसङ्गती । भाव्ये सर्वान्वयव्याप्त्या ब्रह्मात्मत्वात्ततात्मनः ।।६।।**

पुमान् वायु+उत्थ+अब्द+अस्पृक् काल+उत्थ+गुण+तेजः+अप्+भूमय+अस्पृक ख+वत्। आत्मनः सर्व+अन्वय+व्याप्त्या ब्रह्म+आत्मत्वात् अन्तःस्थेन अभित्+असङ्गती भाव्ये।६।

बाह्य वायू जसा सर्वत्र संचार करीत असतां सुगंधी उपवनांतून वा दुर्गंधयुक्त उकिरड्यावरून, हिमाच्छादित पर्वतराजीवरून वा धगधगणाऱ्या आगीतून जात असता त्यांचे सुगंध-दुर्गंध, शीतलता-उष्णता हे विविध धर्म स्वतःला फार काळ चिकटू देत नाही, त्याचप्रमाणे योगी प्राप्त विषयांचा भोग घेऊनही त्यांच्याविषयी आसक्ती ठेवीत नाही. (*'विषयेश्वाविशन्योगी नानाधर्मेषु वर्ततः। गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत्।।'* भा.पु.११:७:४०।।)

ह्या स्थूल देहात राहून तेथे विषयांचा उपभोग घेतांना जरी तो योगी दिसला तरी गंधादीपासून अलिप्त असणाऱ्या वायूसारखा अनासक्त राहतो. *'पार्थिवेष्विव देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः। गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक्।।'* भा.पु. ११:७:४१. हे असे कसे होईल ह्या प्रनाचे उत्तर दिले आहे. **स्व** म्हणजे आत्मा त्याच्यावर दृष्टी (दृक्) लावून म्हणजे आत्मानुसंधानाने हे शक्य होते.

**३. आकाश -** अशा आत्मचिंतनशीलाचेही चित्त निर्विकार, व्यापक अशा आत्म्याचे ज्ञान नसेल तर स्वस्थ राहणार नाही. त्यासाठी आकाशापासून घेतलेला धडा श्लोकाच्या उत्तरार्धात सांगितला आहे. काळाने निर्माण केलेले वायू, तेज, जल यांच्या मिश्रणाने झालेल्या मेघांनी जसे आकाश लिप्त होत नाही तसा ज्ञानी पुरुषाला पंचीकृत भूतांपासून झालेल्या देहाच्या विकारांचा स्पर्शही होत नाही. *'तेजोऽब्वन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः। न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान्।।'* भा.पु. ११:७:४३.

**रस्यः स्निग्धः प्रकृत्याच्छो ज्ञोऽब्वद्धाम्ना पुनाति नॄन् ।**
**छन्नः स्पष्टोऽपि काम्यर्च्यः प्रागुदग्दात्रघं दहन् ।।७।।**
**क्वापि भुङ्क्ते तपस्तेजो-दीप्तोऽक्षोभ्योऽपरिग्रहः । मलास्पृक्सर्वभक्षोऽपि ज्ञोऽग्निवच्चेन्धसीयते ।।८।।**
**तत्तद्रूपः स्वमायोत्थोच्चासत्स्थेशोऽग्निहेतिवत् । कालान्नित्येऽपि दृश्येते नात्मभूतोद्भवक्षती ।।९।।**

रस्यः स्निग्धः प्रकृत्या अच्छः अप्+वत् ज्ञः नॄन् पुनाति। अग्निवत् छन्नः स्पष्टः अपि प्राक् उदक् दातृ+अघं दहन् कामी+अर्च्यः।७। अक्षोभ्यः अपरिग्रहः मल+अस्पृक् क्व अपि भुङ्क्ते। सर्व+भक्षः अपि ज्ञः तपः+तेजः+दीप्तः। इन्धसि इयते । स्व+माया+उत्थ+उच्च+असत्+स्थः ईशः च (तत्तत्रूपः इयते)। कालात् नित्ये अपि आत्म+भूत+उद्भव+क्षती न दृश्येते।८-९।

आणखी घटाकाश, मठाकाश इत्यादी वेगवेगळ्या स्वरूपांत भासले तरी आकाश सर्वव्यापी असल्याने घटादिकांनी ते भिन्न होत नाही किंवा त्यांच्याशी आकाशाचा संबंध नसतो. घटादिकांच्या फुटण्याने आकाशाला काहीच हानी पोंचत नाही. त्याचप्रमाणे देहस्थ प्रत्यगात्मा सर्वव्यापी असल्याने आणि ब्रह्मस्वरूपच असल्याने त्याचा देहादिकांशी संबंध नसतो किंवा त्यांच्यामुळे त्याचे भेदही होत नाहीत. श्रीस्वामिमहाराज आकाशाची व्यापकता माळेतील मण्यांत असलेल्या दोऱ्याच्या व्यापकतेपेक्षा वेगळी असल्याचे स्पष्ट करतात. दोरा मण्यापासून वेगळा करता येतो. आकाश मात्र वेगळे होत नाही. सर्व चराचरांना ते अंतर्बाह्य व्यापून असते. सर्व चराचरांच्या अंतर्बाह्य स्थित असून विच्छिन्न न होता, सर्वांशी समन्वय करूनही निर्लिप्त राहण्याची शिकवण आकाशाकडून घ्यावी हा अभिप्राय. *'अंतर्हितश्च स्थिरजङ्गमेषु ब्रह्मात्वभावेन समन्वयेन। व्याप्त्याऽवच्छेदमसङ्गमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत्।।'* भा.पु. ११:७:४२.

**४. उदक -** ज्ञानी जलाप्रमाणे, मधुर(भाषी), लाघवी आणि स्वभावतः स्वच्छ असतो. पाण्यासारखाच आपल्या दर्शनाने, स्पर्शाने आणि सेवनाने लोकांच्या काया आणि मने पवित्र करतो. *स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम्। मुनिः पुनत्यपां मित्रमीक्षोपस्पर्शकीर्तनैः।।'* भा.पु.११:७:४४. पुढील अडीच श्लोकात अग्नीपासून शिकलेले ज्ञान सांगतात.

**देहः कलावद्विकारी कालेनात्माब्जवद् ध्रुवः । भात्यात्मा तत्स्थद्व्यक्तौ न स्वस्थो बुध्यतेऽर्कवत् ।।१०।।**

देहः कालेन कला+वत् विकारी, आत्मा अब्ज+वत् ध्रुवः। अर्क+वत् आत्मा (स्थूल+बुद्ध्या) व्यक्तौ तत्स्थ+वत् भाति स्वस्थः न बुद्ध्यते।१०।

**५. अग्नि -** अग्नीसारखा योगी कधी गुप्त (राखेने झांकलेला) तर कधी स्पष्ट धगधगता, सकाम भक्तांची (होत्यांची) पूजा घेतो आणि दात्याची मागची-पुढची सगळी पापे जाळतो. *'क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्टः उपास्यः श्रेय इच्छिताम्। भुङ्क्ते सर्वत्र दातृणां दहन् प्रागुत्तराशुभम्।।'* भा.पु. ११:७:४६. अग्नीसारखाच सर्व भक्षण करूनही त्याला मळ (दोष) लागत नाही. तपाच्या तेजाने तो अग्नीसारखा प्रदीप्त असल्याने त्याला कोणत्याही कारणाने क्षोभ होत नाही. अग्नी जसा सर्व जाळून टाकून कांहीच शिल्लक ठेवीत नाही तसाच ज्ञानीही कशाचा संग्रह करीत नाही. अग्नी ज्या ज्या इंधनात प्रवेश करतो त्याचाच आकार घेतो. गोल लाकडाला जाळतांना तो गोल दिसतो तर चौकोनी ठोकळ्याला जाळतांना तो चौकोनी दिसेल. तसाच आत्मा आपल्याच मायेने निर्मिलेल्या देव, प्राणी, मनुष्य इत्यादी देहांत प्रविष्ट होऊन त्यांच्यासारखाच भासतो. पण त्याला स्वतःला कोणताही आकार नसतो. तसेच दिव्याची ज्योती नित्य नवी प्रकाशते आणि मालवते. असे असूनही तिची उत्पत्ती अथवा नाश स्थूल दृष्टीला दिसून येत नाही. ती सतत तेवतांनाच दिसते. तशीच सतत जन्मणाऱ्या आणि नष्ट होणाऱ्या नाशिवंत देहांची क्षणभंगुरता काळाच्या वेगाने माणसाला जाणवत नाही. *'स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः। प्रविष्ट ईयते तत्तत्सरूपोऽग्निरिवैन्धसि।।'* भा.पु. ११:७:४७. 'कालेन क्षोभवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ। नित्यावपि न दृयेते आत्मनोऽग्नेर्यथार्चिषाम्।।' भा.पु.११:७:४९.

**६ चंद्र -** जन्म, स्थिती, वाढ, परिणाम, झीज आणि नाश ह्या सहा विकार असलेल्या देहापासूनही आत्मा वेगळा आहे हे चंद्रापासून घेतलेले ज्ञान पहिल्या श्लोकार्धात सांगितले आहे. देह हा चंद्राच्या कलांप्रमाणे विकारशील आहे; आत्मा मात्र चंद्रासारखा अविकारी आहे. ज्योतिष्यशास्त्रानुसार सूर्य तेजाचा गोलक आहे तर ग्रह आणि नक्षत्रे जलाचे गोल आहेत.

**स्थूलबुद्ध्याऽर्कवद्गोभिर्-गा यथास्वं गुणैर्गुणान् । आदत्ते विसृजत्यत्र सदा योगी न युज्यते ।।११।।**

(स्थूलबुद्ध्या)। यथास्वं गोभिः गाः अर्कवत् योगी गुणैः गुणान् आदत्ते विसृजति सदा न युज्यते।११।

जलमय चंद्र आणि तेजोमय सूर्य जेव्हा एका नक्षत्रात असतात तेव्हा चंद्र सूर्याने झांकल्यामुळे डोळ्याना दिसत नाही. एका नक्षत्रापासून दुसऱ्या नक्षत्राला जायला चंद्राला साठ कला ओलांडाव्या सागतात तर सूर्याला तेरा दिवस आणि रात्री लागतात. म्हणजे (मानवाच्या दृष्टीने) चंद्राचा वेग सूर्याच्या १५ पट आहे. प्रतिपदेला सूर्याचा पंधरावा भागच चंद्राच्या जलांत प्रतिबिंबित होतो. पंधराव्या दिवशी चंद्र आणि सूर्य यांच्यातील अंतर १३ नक्षत्रांचे होते. म्हणजेच २७ नक्षत्रांच्या मंडलात चंद्र आणि सूर्य समांतर होऊन एकमेकांसमोर येतात. म्हणून त्या (पौर्णिमेच्या) दिवशी संपूर्ण सूर्याचे प्रतिबिंब, त्यावर पडलेल्या पृथ्वीच्या सांवलीसहित दिसते. अमावास्या धरून हे चक्र सोळा दिवसांचे होते आणि ह्या काळांत चंद्राचे प्रतिबिंब एकेका कलेने वाढते. अशा सोळा कला होतात. नंतर पुन्हा प्रतिपदेपासून चंद्र आणि सूर्य एकमेकांजवळ येतात आणि चंद्रात उमटणारे प्रतिबिंब एकेका कलेने कमी होत पुढच्या अमावास्येला दिसेनासे होते. ह्या सर्व प्रक्रियेत जलगोलक चंद्राचा आकार कमी-जास्ती होत नाही. तो विकार फक्त कलांचाच आहे. तसेच आत्म्याचे पण आहे. आत्मा देहस्थ भासत असला तरी देहाचे विकार त्याला स्पर्शत नाहीत. पुढच्या अर्ध्या श्लोकात सूर्यापासून काय शिकलो ते सांगतात. *'विसर्गाद्याः स्मशानान्ता भावा देहस्य नात्मनः। कलानामिव चन्द्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मनः।।४८।।'* भा.पु. ११:७:४८.

**७. सूर्य -** स्वतः भेदरहित असूनही तो स्वरूपात स्थित आहे हे न कळून अभिव्यक्त स्थूल देहात असल्यासारखा भासतो. जसा सूर्य स्वर्गात (आकाशात) अविचल असतो पण घागरीतील पाण्यात हलताना दिसतो तसा स्थूल देहाच्या विकारानी आत्मा विकृत झाल्यासारखा वाटतो. *'सूर्यो थिल्लरामाजी (डबक्यात) बिंबला। मूढ म्हणती थिल्लरी बुडाला। त्याचेनि कंपे कंपु मानिला। डहुळला म्हणता तो।।५१।। त्या थिल्लराते नातळतां। गगनीं अलिप्त जेवीं सविता। तैसीच योगियांची योग्यता। देहातीतता देहकर्मी।।५२।।'* ए. भागवत. अ. ७.

**नाऽतिस्नेहप्रसङ्गात्को नश्येद्दीनः कपोतवत् । कश्चित्कपोतः कपोती क्रीडादौ चेरतुर्वने ।।१२।।**
**प्रेम्णाऽशङ्कं मिथोबद्धध्यक्षङ्गौ पाति स श्रमात् । तर्पयन्ती साऽसूतार्भांस्-तांस्तौ पुपुषतुर्मुदा ।।१३।।**

ना अति+स्नेह+प्रसंगात् दीनः कपोतवत् नश्येत्। कश्चित् कपोतः कपोती क्रीडा+आदौ प्रेम्णा अशङ्कं धी+अक्ष+अङ्गौ मिथः वने चेरतुः। सः श्रमात् तर्पयन्तीं कपोतीं पाति। सा अर्भान् असूत। तां तौ (च सः) मुदा पुपुषतुः।१२-१३।

योग्य वेळी सूर्य जसा आपल्या किरणांनी (***गोभिः***) पाणी (***गा***) शोषून घेतो आणि पावसाळ्यांत पुनः ते पाणी सोडतो, तसाच योगी त्या त्या वेळी इंद्रियांद्वारा (**गुणैः**) विषय (**गुणाः**) ग्रहण करतो आणि कालानुसार आणि पात्रानुसार ते विषय दुसऱ्यांना देतो. या दोन्ही क्रियांचा तो अभिमान बाळगीत नाही. *'गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विसृजति। न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपति।।'* भा.पु. ११:७:५०.

**८. कपोत-कपोती -** वरीलप्रमाणे देहातीततेचा अभ्यास केला तरी जर कोणाचाही अतिरिक्त स्नेह त्याच्या नाशालाच कारण होतो हे कपोतापासून घेतलेले हेयलक्षण शिक्षण चार श्लोकांत सांगतात. माणूस (**ना**) (स्त्रीपुत्रादिकांच्या) फारच प्रेमात अडकून त्यांचे कोड कौतुक करू जाईल तर तो पारव्यासारखा विवश होऊन नाश पावेल. एका वनात एक पारवा (कवडा) आणि त्याची मादी जोडीने आपली मने, दृष्टी आणि शरीरे (**धी, अक्षि, अंगौ**) एकमेकाशी गुंतवून (**मिथः**) निरतिशय प्रीतीने विहार करीत होते. हास्य, कटाक्ष आणि आलाप यांनी त्याला सुखविणाऱ्या त्या कपोतीला हवे ते कष्टाने देऊन तो कपोत तिचा सांभाळ करीत होता. यथाकाल त्या कपोतीने अंडी दिली आणि कालांतराने ती फुटून पिले बाहेर आली.

**कदाचिल्लुब्धको नीडाद् बहिःस्थांस्ताञ्छिचाददे । क्रोशन्तीं पतितां दुःखात्-तां तं चापस्मृतिं तथा ।।१४।।**
**द्वन्द्वारामः प्रियाऽशान्तो गृहासक्तो विवन्नरः । क्रान्तापावृतमुक्तिद्वार्-नृजन्मच्युत एव सः ।।१५।।**

कदाचित् लुब्धकः नीडात् बहिःस्थान् तान् शिचा आददे। तां दुःखात् पतितां तथा तं च अपस्मृतिं (लुब्धकः आददे)।१४।
द्वन्द्व+आरामः प्रिय+अशान्तः गृहा+आसक्तः नरः सः विवत् अपावृत+मुक्ति+द्वाः+नृ+जन्म+च्युत एव।१५।

त्यांच्यासाठी केलेल्या इवल्याशा घरटांत त्याना सुरक्षित ठेवून ते दोघे त्यांच्यासाठी चारा आणीत आणि त्यांच्या मुखांत घालीत. अशा रीतीने त्यांचे लालन-पालन होत असतांना ही पिले थोडी मोठी झाली आणि घरट्याच्या जवळपास खेळू लागली. आईवडील बाहेर चारा आणायला गेले असतांना याप्रमाणे तिथे खेळणारी पिले एका फांसेपारध्याने (**लुब्धकः**) टिपली. त्याने आपले जाळे (**शिचा**) लावून त्या पिलांना धरले आणि तो त्यांच्या मातापित्यांची वाट पाहू लागला. वनांतून परत आलेली कपोती, आपल्या पिलांची ती अवस्था पाहून दुःखातिशयाने चीत्कार करीत जाळ्यांत पडली. मागून येणाऱ्या कपोताने हे सर्व जाळ्यांत सांपडलेले पाहून हतबुद्ध आणि गलितगात्र झाला आणि त्यालाही त्या फांसेपारध्याने पकडले. (भागवतांत (११:७:५२-७३) हे कपोत-कपोतीचे गृहस्थाश्रमावरील रूपक अधिक विस्ताराने सांगितले आहे. एकनाथमहाराजांनीही ते सुंदररीत्या रंगविले आहे.)

असा दृष्टान्त मांडून झाल्यावर आतां तो दार्ष्टान्तिक जो पुरुष त्याला लावतात. द्वंद्वांत सुख शोधणारा, प्रिय विषयाच्या लालसेने अशान्त झालेला, घर हेच आनंदाचे धाम आहे अशा बुद्धीने त्यांत आसक्त झालेला पुरुष असाच काळाचे भक्ष्य होतो आणि जणू मुक्तीचे उघडे दार, असा हा दुर्लभ नरजन्म कुटुम्बपोषणातच व्यर्थ गमावून बसतो. परिणामी हीनतर योनीत जन्म घेतो असा भावार्थ. (*'एवं कुटुम्ब्यशान्तात्मा, द्वन्द्वारामः पतत्रिवत्। पुष्णन्कुटुम्बं कृपणः सानुबन्धोऽवसीदति।।७३।। यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम्। गृहेषु खगवत्सक्तस्तमारूढच्युतं विदुः।।७४।।'* भा.पु. ११:७.)

**क्काप्यस्त्यैन्द्रियसौख्यं तन्-नैच्छेदाजगरोऽक्रियः । यदृच्छयाप्तं महान्तं ग्रासं वाल्पं रसारसम् ।।१६।।**
**भक्षेच्चेन्नाप्तोऽनशनो दैवभुक्सर्पवत्स्वपन् । विनिद्रोऽक्रियबल्यङ्ग-धृग्गोमानपि नेहते ।।१७।।**

क्व अपि ऐन्द्रिय+सौख्यं आजगरः अक्रियः तत् न ऐच्छेत्। यदृच्छया आप्तं महान्तं वा अल्पं रस+अरसं ग्रासं भक्षेत्। न आप्तः चेत् अनशनः दैवभुक् स्वपन् विनिद्रः अक्रियः बली+अङ्ग+धृक् गो+मान् अपि न ईहते।१६-१७।

**९. अजगर -** हे समजून घेऊन अटळ प्रारब्ध कर्मानुसारच अर्थादिक सर्व प्राप्त होत असल्याने त्यासाठी व्यर्थ आयुष्य वायां दवडूं नये हा अजगरापासून शिकलेला धडा दोन श्लोकांत सांगितला आहे. इंद्रियांपासून होणारे सुख किंवा दुःख हे मनुष्य देहाप्रमाणेच पश्वादिक योनीत, नरकांत वा स्वर्गात कुठेही सारखेच असते. तेव्हां त्याचा सोस करण्यापेक्षां अजगराच्या वृत्तीने उदासीन राहावे. मग देहाचा निर्वाह कसा होईल असे म्हणाल तर आपल्या नशिबानुसार जो लहान, मोठा, कडू, गोड आहार कुणाची याचना न करता मिळेल तो घ्यावा. (*'ग्रासं सुमृष्टं विरसं, महान्तं स्तोकमेव वा। यदृच्छयैवाप्तं ग्रसेदाजगरोऽक्रियः।।'* भा.पु. ११:८:२.) तोही न मिळाला तर आहार दैवानेच मिळतो अशा निश्चयाने धीर धरून काकुळतीला न येतां उपाशीपोटी निजावे. *'जैसे न प्रार्थितां दुःख। प्राणी पावताती देख। तैसे न इच्छितां इन्द्रियसुख। भोगवी आवश्यक अदृष्ट।।'* ए.भा. ८:२१. बाह्यतः झोपूनही आपल्या हिताचा विचार जागा ठेवावा. ('स्वप्नजागृती मुकला। सुषुप्ती सांडोनि निजेला। शून्याचा पासोडा झाडिला। निजीं पहुडला निजत्वें।।' ए.भा. ८:४०.) आवश्यक ते बळ असूनही इंद्रियांच्या चिथावणीला दाद न देतां निष्क्रिय अजगराप्रमाणे पडून राहावे. मग हळूहळू इंद्रियांचे पाहणे, ऐकणे इत्यादि व्यापार थांबून जातात. (*'ओजः सहोबलयुतं बिभ्रद्देहमकर्मकम्। शयानो वीतनिद्रश्च नेहतेन्द्रियवानपि।।'* भा.पु. ११:८:४.)

**पूर्णो हीनोऽप्यजपरो न सर्पति न शुष्यति । ज्ञोऽब्धिवत्सिन्धुभिर्निम्नोऽनन्तपारो दुरत्ययः ।।१८।।**
**सदाऽक्षोभ्यो दुर्विगाह्यः प्रसन्नः स्तिमिताब्धिवत् ।**

ज्ञः अब्धिवत् सिन्धुभिः पूर्णः न सर्पति, हीनः न शुष्यति। स्तिमित+अब्धिवत् निम्नः अनन्तपारः दुः+अत्ययः अक्षोभ्यः (भवेत्)।१८।

**१०. समुद्र -** अशी उदासीनवृत्ती धारण केल्यावरही दैववशात् मिळणाऱ्या भोगांचा हर्ष किंवा न मिळाल्याचा खेद न मानता समचित्त राहण्याची समुद्राची शिकवण पुढच्या दीड श्लोकांत सांगतात. समुद्र जसा पावसाळ्यांत भरभरून वाहणाऱ्या नद्या येऊन मिळाल्या तरी फुगत नाही, आपली मर्यादा सोडत नाही किंवा ग्रीष्माने नद्यांचे प्रवाह आटले तरी कोरडा पडत नाही, तसाच ज्ञानी इष्टांच्या संयोगाने उचंबळत नाही (***न सर्पति***) किंवा त्यांच्या वियोगाने शोकाने सुकत नाही (***न शुष्यति***). सागरासारखाच तो गहन, गंभीर (***निम्नः***) असतो. समुद्राचा जसा पार लागत नाही तसाच योग्याच्या चित्ताचाही थांग लागत नाही. समुद्र जसा चौफेर विस्तीर्ण असतो तसाच योगी देशकालाच्या मर्यादांनी सीमित नसतो. सागराला ओलांडणे जसे दुरापास्त आहे (***दुरत्यय***) तसेच ज्ञानी पुरुषाची आज्ञा देवादिकांनाही अनुल्लंघनीय असते. समुद्र जसा आपली मारवेलीची मर्यादा ओलांडीत नाही तसाच ज्ञानी रागादि विकारांपासून मुक्त असल्याने अविकारी (***अक्षोभ्यः***) असतो. समुद्रात प्रवेश करणे कुणालाही सहज शक्य नसते तसेच योग्याशी कुणालाही सहज सलगी करता येत नाही. तरीही शांत सागरासारखाच तो बाह्यतः प्रसन्न असतो. (*'मुनिः प्रसन्नगम्भीरो दुर्विगाह्यो दुरत्ययः। अनन्तपारो ह्यक्षोभ्यः स्तिमितोद इवार्णकः।। समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः। नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः।।'* भा.पु. ११८५-६.)

**११. पतंग -** 'कुरङ्गमातङ्गपतङ्गभृङ्गमीना हताः पञ्चभिरेव पञ्च। एकः प्रमादी कथं न हन्यते यः सेवते पञ्चभिरेव पञ्च।।' (हरीण, हत्ती, पतंग, भुंगा आणि मासा हे अनुक्रमे नाद, स्पर्श, रूप, गंध आणि स्वाद ह्या एकेका

**नाऽवशोऽग्नौ विवन्नश्येत् स्त्रीलीलारूपमोहतः ।।१९।।**
**गृण्हीयात्सर्वतः सारं रमेन्नैकत्र चाल्पभुक् । संग्रहे नाशबीजेऽपि मधुकृद्वन्मुनिः सदा ।।२०।।**

स्त्री+लीला+रूप+मोहितः ना अग्नौ विवत् नश्येत्।१९। अपि मधुकृत्+वत् अल्प+भुक् मुनिः सदा सर्वतः सारं गृह्णीयात् न एकत्र। नाश+बीजे संग्रहे अपि (न) रमेत्।२०।

विषयाच्या आसक्तीने नाश पावतात तर या पांचही विषयांचा स्वैर उपभोग घेणारा कसा वांचेल?) या गरुडपुराणातील (प्रेतकल्पखंड-धर्मकांड ११:१८) वचनाकडे दुर्लक्ष करून विषयांतच रमणारा नाश पावतो हे ह्या पांचाकडून घतलेले शिक्षण पुढच्या साडेचार श्लोकांत सांगत आहेत. दिव्याच्या ज्योतीच्या रूपाला भुललेला पतंग जसा आपण होऊन दिव्यावर झेप घालून मृत्युमुखी पडतो तसाच स्त्रियांच्या रूपाला, तिच्या हावभाव-कटाक्षांना भुललेला असंयमी पुरुष नरकात पडतो.

**१२. मधुकृत् (मधुकर) -** या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे फुलामध्ये शिरून त्यांतला मध ग्रहण करतो तो भुंगा आणि दुसरी आपल्या आहारासाठी मध करणारी मधमाशी! भुंगा जसा लहान मोठा सर्व फुलांचा रस घेत एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जात असतो तद्वतच साधूने अनेक शास्त्रे आणि अनेक गुरूंपासून सार घेत जावे. (***'बहुशास्त्रगुरूपासनेऽपि सारादानं षट्पदवत्', सांख्यदर्शन ४:४***). स्वादाच्या आसक्तीने भुंगा एकाच फुलात राहिला तर संध्याकाळी ते फूल मिटले तर त्यांत अडकून पडतो. तसाच साधक एकाच घरी आसक्त होऊन राहिला तर त्यांच्या मोहात सांपडण्याची शक्यता आहे. म्हणून परिमित आहार ठेवून साधकाने एका ठिकाणी रमूं नये. मधमाशी कष्टाने संग्रह करून मधाचे पोळे करते ते तिच्याच नाशाला कारणीभूत होते ह्यावरून हा धडा घ्यावा की संग्रहांत आपल्याही नाशाचे बीज आहे म्हणून संग्रह करू नये. (*'अणुभ्यच महद्भ्यच शास्त्रेभ्यः कुशलो नरः। सर्वतः सारमादद्यात्पुष्पेभ्य इव षट्पदः।।'* भा.पु. ११:८:१०. 'सायंतनं श्वस्तनं वा न सङ्गृहीत भिक्षुकः। मक्षिका इव सङ्गृह्णन्, सह तेन विनश्यति।।' भा.पु. ११:८:१२.)

**बध्येत नाऽङ्गनास्पर्शाच्-छूरैर्हन्येत वेभवत् । अन्योऽकात्सञ्चितं लुब्धैर्न भुक्तं नार्पितं धनम् ।।२१।।**
**भुङ्क्तेऽकार्जितगृह्यन्नं प्राग्भिक्षुर्मधुहेव च ।**

अङ्गना+स्पर्शात् बध्येत, वा इभ+वत् शूरैः हन्येत। लुब्धैः अकात्+सञ्चितं न भुक्तं न अर्पितं धनं मधुहा इव अन्यः भुङ्क्ते। अक+अर्जित+गृहीत+अन्नं प्राक् भिक्षुः (भुङ्क्ते)।२१।

**१३. हत्ती -** मादीच्या वासाने मस्त हत्ती आपल्यासाठी खणलेल्या गर्तेत सांपडतो आणि जन्माचा दास होऊन जातो. किंवा दुसऱ्या बलिष्ठ हत्तीकडून मारला जातो. म्हणून शहाण्या माणसाने स्त्रीस्पर्शापासून दूर रहावे. (*'पदाऽपि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि। स्पृशन्करीव बध्येत करिण्या अङ्गसङ्गतः।।'* भा.पु. ११:८:१३.)

**१४. मधुहा -** त्याग किंवा भोग न करतां केलेला द्रव्यसंग्रह आपला घातच करतो आणि आपण प्रयत्न न करतांही आपल्याला अन्नादि भोग प्राप्त होऊ शकतात हे मधमाशी आणि मध गोळा करणारा मधुहर यांच्यापासून घेतलेले शहाणपण सांगतात. एकाने कष्टाने संपादन केलेले धन त्याने स्वतः भोगले नाही किंवा इतरांनाही दान केले नाही तर मधमाशीच्या पोळ्यांतल्या मधाप्रमाणे दुसराच लुबाडतो. तसेच गृहस्थाने उद्योग करून मिळवलेले अन्न त्याच्या आधीच संन्यासी खाऊन जातो. (*'न देयं नोपभोग्यं च लुब्धैर्यद्दुःखसञ्चितम्। भुङ्क्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधुः।।'* भा.पु. ११:८:१४.)

**१५. हरीण -** अर्ध्या श्लोकांत हरिणाची शिकवण सांगितली आहे. ग्राम्य गीताच्या श्रवणाने (भक्तिसंगीताच्या नव्हे) पुरुष घंटानादाने भुललेल्या हरिणासारखा बंधनांत अडकतो. नृत्यादिक पाहिल्यानेसुद्धा हरिणीच्या पोटी जन्मलेल्या ऋष्यशृङ्गमुनीप्रमाणे माणूस वेडा होतो. (*'ग्राम्यगीतं न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित्। शिक्षेद्धरिणाद्बद्धान्मृगयीर्गीतमोहितात्।। नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम्। आसां क्रीडनको वश्य, ऋष्यशृङ्गो मृगीसुतः।।'* भा.पु. ११:८:१७-१८.)

**ना बध्येतैणवद्गीतान्-नृत्याद्वाप्यृष्यश्रृङ्गवत् ।।२२।।**
**प्रमाथिजिह्वया नैति बडिशैर्मत्स्यवल्लयम् । जय्याल्पभुज्या साऽसक्त्या जितं सर्वं जिते रसे ।।२३।।**

गीतात् नृत्यात् वा ना ऐणवत् वा ऋष्यशृङ्गवत् बध्येत।२२। ना प्रमाथि+जिह्वया बडिशैः मत्स्यवत् लयं एति। सा अल्प+भुज्या असक्त्या जय्या। रसे जिते सर्वं जितम्।२३।

**१६. मासा -** मत्स्यापासून मिळालेले ज्ञान सांगतात. मनाला अशांत करणारी जीभ माणसाचा, आमिषाच्या ओढीने गळींत अडकणाऱ्या माशासारखा घात करते. त्यासाठी मिताहाराने आणि अनासक्तीने जिभेवर ताबा मिळवावा. स्वादाची आवडनिवड टाकून अन्न औषधाप्रमाणे खावे. आधीचा (दुसऱ्या क्रमांकाचा) गुरू जो देहांतर्गत वायू (प्राण) त्याच्याकडून घेतलेलाच हा धडा वेगळ्या तऱ्हेने सांगितला आहे. सर्व इंद्रियांत जिह्वा ही जिंकण्याला कठीण असल्याने तिचा विषय जो रस तो जिंकला की सर्व (विषय) जिंकले असे म्हटले आहे. (*'इन्द्रियाणि जयन्त्याशु निराहारा मनीषिणः। वर्जयित्वा तु रसनं तन्निरन्नस्य वर्धते।।'* भा.पु. ११:८:२०. *'विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः। रसवर्ज्यं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।'* भ.गीता २:५९.)

**१७. वेश्या -** अगदी जिह्वाही जिंकणाऱ्या साधकाच्या परमार्थाला आशा अडवते. त्यासाठी वश्येयेकडून घेतलेले नैराश्याचे शिक्षण पुढच्या अडीच श्लोकांत दिले आहे. विदेहपुरीत राहणारी एक पिंगला नांवाची वेश्या होती. एका रात्री भरपूर पैसे देणाऱ्या गिऱ्हाइकाच्या आशेने (रस्त्यावरील येणाऱ्या-जाणाऱ्या पुरुषांना खुणावीत) दारांत उभी राहिली. रात्रभर वाट पाहूनही अपेक्षित असलेला पुरुष तिला मिळाला नाही. द्रव्याची तीव्र लालसा न पुरल्याने तिला जे वैफल्य आले त्यांतूनच दैवयोगाने तिला परिणामी सुख देणारा उबग (**निर्वेद**) आला आणि तिचा विवेक जागा झाला. स्वतःचा धिक्कार करीत ती म्हणू लागली, 'आपल्याच अंतरात राहणाऱ्या, आत्मानुभवाने निरतिशय आनंद आणि परम पुरुषार्थ देणाऱ्या, हृदयांतील (अहंकाराची) गांठ तोडून संशयाचे जाळे छेदून स्वस्वरूपात रमविणाऱ्या, रामाला सोडून मी ह्या

**वेश्यैकार्थदकान्ताशा-ध्वस्तनिद्रा सुखावहं । चिन्ताहेतुं हि निर्वेदं गत्वाऽत्मस्थं रतार्थदम् ।।२४।।**
**रामं हित्वा कुवृत्त्यान्यं भीशुङ्मोहदमध्रुवम् । काङ्क्षे धिङ्मात्मनात्मानं रमे क्रीत्वाऽमुनेति सा ।।२५।।**
**मत्वा तथाऽभूत्ध्याशाऽकं नैराश्यं परमं सुखम् ।**

एका वेश्या अर्थद+कान्त+आशा+ध्वस्त+निद्रा चिन्ता+हेतुं हि सुखावहं निर्वेदं गत्वा आत्मस्थं रत+अर्थदं।२४। रामं हित्वा कुवृत्त्या अन्यं भी+शुक्+मोहदं अध्रुवं काङ्क्षे। मां धिक्। आत्मना आत्मानं क्रीत्वा अमुना (अहं) रमे' इति सा।२५। मत्वा तथा अभूत्। आशा अकं, नैराश्यं परमं सुखम्।

हीन (वेश्या)वृत्तीने, ज्याच्या मनाविरुद्ध वागल्यास भय, विरहाने शोक आणि अतिस्नेहाने मोह वांट्याला येतात अशा नाशिवंत कामलंपट पुरुषाची इच्छा केली! माझा धिक्कार असो!! यापुढे मात्र मी हा देह स्वयंप्रकाश आत्मारामाला विकून (समर्पण करून) अपरोक्षतया (त्याच्याशी एकरूप होऊन) रममाण होईन.' असा विचार करून आणि आशेचा खोडा मोडून ती आत्मानंदांत निमग्न झाली. यावरून हे सप्ष्ट होते की आशाच सर्व दुःखाचे कारण आहे. नैराश्यांतच निरतिशय सुख आहे. *'निराशः सुखी पिङ्गलावत्'* असे सांख्यदर्शनात (अ.१४ सूत्र ९) म्हटले आहे. (*'आशा हि परमं दुःखं नैराश्यः परमं सुखम्। यथा संछिद्य कान्ताशा सुखं सुष्वाप पिङ्गला।।'* भा.पु. ११:८:४३.)

**१८. टिटवा -** आशारहित साधकानेही जर परिग्रह केला तर दुःखालाच कारण होतो ही टिटव्याची शिकवण एका श्लोकांत दिली आहे. आपल्या आवडत्या वस्तूंचा परिग्रह (संग्रह) दुःखपर्यवसायी आहे हे जाणणाऱ्याला अकिंचनालाही अपरिमित सुख मिळते. अकिंचन म्हणजे केवळ दरिद्री नव्हे तर ज्याने सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे असा. टिटवा मांसाचा घास (न खातां) तोंडांत धरून उडाला तर बाकीचे टिटवे त्याच्यावर हल्ला करून त्याला हैराण करून सोडतात. त्याने तो घास टाकून दिला तर मात्र सगळे टिटवे त्या घासाकडे झेपावतात आणि आमिष टाकून दिलेला (**व्यामिष**) टिटवा परिग्रहापासून मुक्त असल्याने दुरून सुखाने (सुखी) त्यांची मजा पाहात बसतो. (*'सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः। तदामिषं परित्यज्य स सुखं समविन्दत।।'* भा.पु. ११:९:२.)

**परिग्रहोऽकाय तज्ज्ञोऽस्वोऽप्यनन्तसुखायते ।।२६।।**
**सामिषं कुररं हन्ति शूरोऽतो व्यामिषः सुखी । मानावमानचिन्तोनः स्वक्रीडः स्वरतिः सुखी ।।२७।।**
**बालवद्धि जडोऽज्ञोऽर्भश्-चात्मानन्दो गुणातिगः । भङ्क्त्वैकैकं महारावान् रणन्तौ द्वौ कुमार्यपि ।।२८।।**
**पाण्योर्धृत्वैकैकशङ्खं रहःकृत्येऽलभत्सुखम् । कलिर्भूम्नि द्वयोर्वार्ता ह्येकतस्तच्छङ्खवच्चरेत् ।।२९।।**

परिग्रहः अकाय। तज्ज्ञः अस्वः अपि अनन्त+सुखायते। सामिषं कुररं शूरः हन्ति, व्यामिषः सुखी। मान+अवमान+चिन्ता+ऊनः स्व+क्रीडः स्व+रतिः जडः अज्ञः बालवत् सुखी। अर्भः गुण+अतिगः च आत्म+आनन्दौ। द्वौ रणन्तौ एक+एकं महा+रावान् (शङ्खान्) भङ्क्त्वा पाण्योः एक+एक शङ्खं धृत्वा कुमारी अपि रहः+कृत्ये सुखं अलभत्। भूम्नि कलिः द्वयोः वार्ता हि शङ्खवत् एकतः चरेत्।२८-२९।

**१९. बालक -** अशा परिग्रहशून्यालाही मानापमान आणि चिंता सोडतां आले तर तो परमसुखी होईल. ही बालकापासून घेतलेली शिकवण एका श्लोकात सांगतात. त्रिगुणात्मक प्रकृतीला ओलांडून परमात्मस्वरूप झालेला योगी, मान, अपमान आणि चिंता यांनी रहित असलेल्या स्वतःशीच खेळणाऱ्या आणि आपल्यातच हरवून गेलेल्या निष्क्रीय, अजाण बालकाप्रमाणे आत्मानंदात निमग्न असतो. आत्मसाक्षात्कारी पुरुष आणि बालक हे दोघेही चिन्तामुक्त असल्याने आपल्याच आनंदांत परमानंदात न्हात असतात. (*'द्वावैव चिन्तया मुक्तौ परमानन्द आप्लुतौ। यो विमुग्धो जडो बालो, यो गुणेभ्य परं गतः।।'* भा.पु. ११:९:४.)

**२०. कुमारी -** ह्या गुणातीत अवस्थेच्या प्राप्तीसाठी अभ्यासाची आवश्यकता आहे. हा अभ्यास अनेकांनी करून होत नाही आणि दोघांतही होत नाही हे कुमारीच्या कांकणाकडून घेतलेले कपिलमुनिप्रणीत सांख्यदर्शनातील (४:१०) शिक्षण सांगितले आहे. कुणी एक कुमारी घरांतील सर्व कुटुंबीय बाहेर गेलेले असतां आलेल्या सोयऱ्यांच्या पाहुणचारासाठी एकांतात साळी कांडायला बसली. त्या वेळी तिच्या हातातील शंखांच्या कांकणांचा मोठा आवाज होऊ लागला.

**एकचार्यप्रमत्तोऽल्प-वाग्गुहास्थोऽगृहो मुनिः । एकोऽहिवद्गत्यलक्ष्यो गृहारम्भोऽध्रुवात्मनः ॥३०॥**
**विफलोऽकाय सर्पोऽन्य-कृतधाम्न्येधते सुखम् ।**

अहिवत् मुनिः एक+चारी अप्रमत्तः अल्प+वाक् अगृहः गति+अलक्ष्यः। अध्रुव+आत्मनः गृह+आरम्भः।३०। विफलः अकाय। सर्पः अन्य+कृत् धाम्नि सुखं एधते।

त्या आवाजाने आपली गरीबी पाहुण्याना कळेल ह्या लाजेने तिने सगळी कांकणे काढली आणि प्रत्येक हातात फक्त दोन-दोन ठेवली. पण त्याचाही आवाज होतो असे पाहून तिने आणखी कांकणे काढून हातात सौभाग्यचिह्न म्हणून एकेकच कांकण ठेवले (***'पाण्योः एकैक शंखं धृत्वा'***). अशा रीतीने तिचे साळी कांडण्याचे काम गुप्तपणे करून (***'रहःकृत्ये'***) ती सुखी झाली (***'सुखं अलभत्।'***). या कलियुगात भूलोकी अनेकजण किंवा दोघेसुद्धा एकत्र आले की खाण्यापिण्याच्या (विषयाच्या, प्रपंचाच्या) गोष्टी होणारच. त्यामुळे शंखा(च्या कांकणां)प्रमाणे एकट्यानेच तप करावे. (*'वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि। एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कङ्कणः॥'* भा.पु. ११:९:१०.)

**२१. सर्प -** वरीलप्रमाणे निःसंग झाल्यावरही परमार्थांत विघ्न होऊं नये यासाठी ठराविक घर करू नये हे सर्पाकडून घेतलेले शिक्षण दीड श्लोकात सांगितले आहे. मुनीने सापासारखे एकट्याने संचार करीत (***'एकचारी'***), सावधानपणे (***'अप्रमत्त'***), बोलणे मोजके ठेवून (***'अल्पवाक्'***), बाहेरील वर्तनावरून आपली आंतरिक स्थिती प्रकट न होऊ देता (***'गतिअलक्ष्यो'***), वास्तव्यासाठी घर न बांधता (***'अगृहो'***) गुहेत किंवा घळीत राहावे (***'गुहास्थः'***). नाशिवंत देहासाठी (***'अध्रुवस्य आत्मनः'***) घर बांधण्याचा खटाटोप (***'गृहारम्भः'***) व्यर्थ (***'विफलः'***) आणि कष्टदायक (***'अकाय'***) आहे हे जाणून, *'अनारम्भेऽपि परगृहे सुखी सर्पवत्'* कपिलमुनींच्या वचनाला (सांख्यदर्शन ४:१०) अनुसरून साप जसा दुसऱ्याने बांधलेल्या घरांत सुखाने राहतो तसे राहावे. (*'एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः। अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः॥ गृहारम्भोऽतिदुःखाय विफलश्चाध्रुवात्मनः। सर्पः परकृतं वेश्म प्रविश्य सुखमेधते॥'* भा.पु.११:९:१४-१५.)

**जितश्वासासनेनेशे वैराग्याभ्यासबद्धहृत् ।।३१।।**
**संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्ववृद्ध्यैत्यनिन्धनम् । निर्वाणं वेत्त्यतो नान्तर्-बहिःस्थं मुनिरात्मदृक् ।।३२।।**
**यथेष्वितात्मेषुकृन्नो वेदेनं यान्तमग्रतः ।**

जित+श्वास+आसनेन वैराग्य+अभ्यास+बद्ध+हृत् ईशे।३१। संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्व+वृद्ध्या अनिन्धनं निर्वाणं एति। अतः आत्म+दृक् मुनिः अन्तः बहिस्थं न वेत्ति।३२। यथा इषु+आत्मा इषु+कृत् अग्रतः यान्तं इनं न वेद।

**२२. शरकार -** एकांतात वास करणाराही जर आसन आणि श्वास यांना जिंकेल तरच त्याला अविचल एकाग्रतेचा लाभ होईल हे शरकाराकडून घेतलेले शिक्षण आतां दोन श्लोकात सांगतात. वैराग्यपूर्वक अभ्यास करून आसनजय आणि प्राणजय साधणाऱ्या योग्याने द्वैताचे भानही जिच्यात राहत नाही अशा समाधीच्या सिद्धीसाठी दोषदृष्टीचा त्याग आणि विषयांचा भोग न मिळाला तरी तळमळ न होणे यांच्या सरावाने दृढ झालेल्या ऐहिक आणि पारलौकिक विषयांसंबंधीच्या वैराग्याने विक्षेपांचा निरास करून, चित्ताला स्थिर करण्याच्या अभ्यासाने चित्तावर ताबा मिळवून ते बाणाप्रमाणे प्रणवरूपी धनुष्यावर चढवून त्याचे प्रत्यक्ब्रह्माशी एकरूप अशा परब्रह्माच्या लक्ष्यावर उत्तम प्रकारे संधान करावे. भावार्थ असा. *'यत्रैकाग्रता तत्राविशेषात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (४:४:११) (चित्ताची) एकाग्रता हे ध्यानाचे प्रमुख साधन होय. ती एकाग्रता *'आसीनः संभवात्'* या सूत्रानुसार (४:१:७) आसनानेच साधत असल्याने प्रथम आसनजय केला पाहिजे. आसन पक्के झाले की मग श्वासावर नियंत्रण करतां येते. श्वास(प्राण)जय झाला की श्वासाच्या अधीन असलेले मनही निश्चल होते. त्याला वैराग्याने विक्षेपरहित करून आणि अभ्यासाने बांधून म्हणजेच वश करून (**अभ्यासेन बद्धं**) ध्येयावर (परमेश्वरावर) स्थिर करावे (**ईशे संयुक्तं**). त्या मनाचा झोपेत जसा लय होतो तसा मुळीच होत नाही. लय आणि विक्षेप हे मनाचे गुणधर्म असले तरी परमानंदस्वरूप ईश्वराशी संलग्न झाल्याने लय-विक्षेपांना कारणीभूत तमोगुण आणि रजोगुण यांचे दमन होते आणि सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो.

**प्रेम्णाप्यचलहृद्ध्यानाद्-विष्णोः सारूप्यमेति ना ।।३३।।**
**प्राग्रूपमुत्सृजन्पेशस्कृद्ध्यानात्कीटवद्द्रुतम् ।**

विष्णोः प्रेम्णा अचल+हृत्+ध्यानात् ना प्राक्+रूपं उत्सृजन् पेशस्कृत्+ध्यानात् कीटवत् द्रुतं सारूप्यं एति।३३।

शेवटी सत्त्वगुणाचाही उपशम होऊन ते मन तिन्ही गुण आणि त्यांची कार्ये यांच्यापासून मुक्त होते (**कर्मवासनां मुक्त्वा**). असे वृत्तिशून्य (**निर्वाणं**) मन ध्येयाकार (ब्रह्माकार) होऊन आपल्या स्वरूपात स्थिर होते. आा रीतीने पतंजलींच्या *'योगश्चित्तवृत्तिनिरोधः'* (यो.सू. १:४) 'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्' या सूत्रांनसार योग सिद्ध होतो. वृत्तिशून्य मनाच्या ध्येयाकार अवस्थेलाच योगाच्या भाष्यकारांनी असंप्रज्ञात समाधी असे नाव दिले आहे. (*'मनसो वृत्तिशून्यस्य ब्रह्माकारतया स्थितिः। याऽसम्प्रज्ञातनामाऽसौ समाधिरभिधीयते।।'*) द्वैताचे भानच नसल्याने आंत-बाहेर त्या योग्याला कांहीच दिसत नाही कारण तो स्वरूपाच्या दर्शनात निमग्न असतो (*'आत्मदृक्'*). आतां दृष्टान्त सांगितला आहे. *'इषुकारवन्नैकचित्तस्य समाधिहानिः'* या सांख्यसूत्रानुसार (४:१४) बाणाला धार लावण्यात गढून गेलेल्या शरकाराला ('इषुकार') समोर रस्त्यावरून वाजतगाजत गेलेला राजाही (**इन**) कळला नाही. अशा उपासकाला (प्रारब्धाच्या प्रतिबंधाने) आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वीच मृत्यू आला तर त्याच्या अभ्यासाच्या प्रभावाने आणि ईश्वराच्या अनुग्रहाने मृत्यूच्या वेळी सुषुम्ना नाडीचा मार्ग मिळून तो मुक्त होतो अशा अर्थाचे ब्रह्मसूत्र आहे (४:२:१७). *('मन एकत्र संयुज्याज्जितश्वासो जितासनः। वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतन्द्रितः।। यस्मिन्मनो लब्धपदं यदैतच्छनैः शनैर्मुञ्चति कमरेणून्। सत्त्वेन वृद्धेन रजस्तमच विधूय निर्वाणमुपैत्यनिन्धनम्।। तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किञ्चिद्बहिरन्तरो वा। यथेषुकारो नृपतिं व्रजन्तमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे।।'* भा.पु. ११:९:११-१३.)

**यथोर्णनाभिस्ततोर्णां विहार्यान्तेऽत्ति तां तथा ।।३४।।**

**प्राक्स्वमायासृष्टमेकः संहृत्याभूत् क्षयेऽद्वयः । शक्त्याखिलाश्रयः सर्वेट् कालेनात्मानुभावतः ।।३५।।**

यथा ऊर्णनाभिः ऊर्णां तत विहार्य तां अत्ति तथा..।३४। एकः प्राक् स्व+माया+सृष्टं (जगत्) संहृत्य क्षये अद्वयः अभूत्। शक्त्या अखिल+आश्रयः सर्वेट् आत्म+अनुभावतः..।३५।

**२३. कुंभारीण माशी (पेशस्कार) -** वरीलप्रमाणे ध्याननिष्ठ असलेल्या साधकाला जीवात्म्याशी एकरूपच अशा परमात्म्याचे स्वरूप प्राप्त होणे हे नवल नाही, हे कीटकापासून मिळवलेले ज्ञान आतां सांगत आहेत. प्रेमाने, द्वेषाने किंवा भयानेसुद्धा (**प्रेम्णा अपि**) व्यापक परमात्म्याचे (**विष्णो**ः) स्थिर चित्ताने ध्यान केले म्हणजेच, विजातीय प्रत्ययांचा निरास करीत आणि सजातीय प्रत्ययांना प्रवाहित करून निदिध्यासन केल्याने, मिथ्या उपाधींशी तादात्म्य पावून अध्यासाने स्वीकारलेले कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादींनी युक्त असे मायिक रूप (जीवत्व) टाकून देऊन पुरुष (**ना**) शीघ्रच परमात्म्याशी एकरूप होतो. ('प्रारब्धजनित') प्रतिबंध नसले तर याच जन्मात अन्यथा जन्मातराने तो मुक्त होतो. हेच व्यासमुनींनी *'ऐहिकमप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्'* सांगितले आहे. प्रतिबंधांच्या अभावी ज्या जन्मी उपदेश व अभ्यास त्याच जन्मी ज्ञान होऊन मोक्ष होतो हे ठीक आहे. पण तसा तो झाला नाही तर जन्मांतरी होतो याला प्रमाण म्हणून ऐतरेय उपनिषदातील (२:५) वामदेवाने गर्भात पहुडलेल्या अवस्थेतच आपले ज्ञान प्रकट केल्याचे उदाहरण दिले आहे. कुंभारीण माशीने आपल्या घरट्यात आणून ठेवलेला किडा जसा तिच्याकडून वरचेवर दंश झाल्याने तिच्या भयाने तिचे निरंतर ध्यान करून तिच्यासारखाच (कुंभारीण माशीच) होतो. जीव तर स्वरूपतः ब्रह्मच असल्याने (*'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'*, बृ.उ. ४:४:५१) त्याचे ब्रह्मरूप पावणे हे नवल नाही. ('यत्र यत्र मनो देही धारयेत् सकलं धिया। स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वाऽपि याति तत्तत्स्वरूपताम्।। कीटः पेशस्कृतं ध्यायन् कुडां तेन प्रवेशितः। याति तत्साम्यतां राजन् पूर्वरूपमसन्त्यजन्।।' भा.पु. ११:९:२२-२३.)

**साम्येतसत्त्वादिशक्तिः प्रधानपुरुषेडजः । व्युपाधिः परमानन्दो मोक्षाख्यः सपरावरः ।।३६।।**
**गुणत्मिकां स्वमायां स क्षोभयन्स्वानुभावतः । तया सृजति सूत्रं सा त्रिगुणा शक्तिरासृजत् ।।३७।।**
**विश्वं यस्मिन्प्रोतमेतद् येन संसरते पुमान् ।**

साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः वि+उपाधिः प्रधान+पुरुष+ईट् अजः मोक्ष+आख्यः स+पर+अवरः परम+आनन्दः (आस्ते)।३६। सः स्व+अनुभावतः गुण+आत्मिकां स्व+मायां क्षोभयन् तया सूत्रं सृजति। सा त्रिगुणा शक्तिः विश्वं असृजत्।३७। यस्मिन् पुमान् संसरते येन तत् विश्वं प्रोतम्।

**२४. कांतीण -** ईश्वराच्या एकमेवाद्वितीयत्वाचे कांतिणीकडून घेतलेले ज्ञान आतां सांगितले आहे. कुठल्याही बाह्य सामग्रीविना कोळीण (**ऊर्णनाभी**) जशी आपल्याच नाभीपासून निघालेल्या तंतूला मुखाद्वारे काढून तो पसरून त्या जाळ्यात क्रीडा करते आणि ती क्रीडा झाल्यावर ते जाळे खाऊन टाकते. त्याचप्रमाणे सृष्टीच्या पूर्वी (**'प्राक्'**) स्वयंभू एकमेवाद्वितीय (**'एकः'**) परमेश्वराने आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) उपादानकारण जी माया तिच्या द्वारां जगाची उत्पत्ती केली. जगताच्या लयाच्या वेळी (**क्षये**) आपल्याच काळशक्तीने त्याचा आपल्यांतच उपसंहार करून पुनश्च तो एकमेवाद्वितीय झाला. कालांतराने आपल्या आत्मशक्तीने (**आत्मानुभावतः**) सत्त्वादि त्रिगुणांची साम्यदशा झाल्यावर (**साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः**), प्रकृती आणि पुरुष यांचा स्वामी आणि म्हणूनच अजन्मा (**प्रधान+पुरुष+ईट् अजः**) असलेला निरुपाधिक (**व्युपाधिः**) परमानंदस्वरूप (**परमानंदः**) मोक्ष (**मोक्षाख्यः**) तोच आहे. हा कोण आहे? ब्रह्मा? नव्हे तर ब्रह्मादि श्रेष्ठ आणि इतर सर्व जीवात्मे यांचा स्वतांत उपसंहार करणाराच (**सपरावरः**) मोक्षरूपी परमात्मा आहे. तोच परमात्मा आपल्या आत्मशक्तीने (**स्वानुभावतः**) आपल्या त्रिगुणात्मक मायेला क्षोभवून तिच्या द्वारा जीवाच्या संसरणाचे कारण जे क्रियाशक्तिप्रधान महत्तत्त्व (**सूत्र**) निर्माण केले. त्याच त्रिगुणात्मक शक्तीने त्या सूत्रापासून अहंकाराद्वारा सर्व विश्वाची निर्मिती केली. त्याच कारणभूत समष्टीरूप सूत्राने हे जग गुंफले आहे.

**देहात्स्तो बोधवैराग्ये पारक्यात्सोद्भवक्षयात् ।।३८।।**
**आत्मेष्टभृत्सृष्टबीजः प्रियेच्छुर्नश्यति द्रुवत् । गावः स्वार्थे सपत्नीवत्तं लुनन्ति हि दुर्लभम् ।।३९।।**
**मत्वा नृजन्मात्तवित्क्ष्मां चरे मुक्तोऽनहंकृतिः ।**

पारक्यात् स+उद्भव+क्षयात् बोधवैराग्ये स्तः।३८। प्रिय+इच्छुः आत्म+इष्ट+भृत् सृष्ट+बीजः द्रुवत् नश्यति। इन्द्रियाणि तं सपत्नीवत् लुनन्ति।३९। नृजन्म दुर्लभं हि मत्वा आत्त+वित् क्ष्मां अन्+अहंकृतिः चरे।

याज्ञवल्क्याने गौतमाला सांगितल्याप्रमाणे हा लोक, परलोक, सर्व जीवमात्र ज्या सूत्रांत बांधलेले आहेत ते सूत्र म्हणजे वायूच होय (बृ.उ. ३:७:२). याच प्राणात्मक सूत्राने जीव या संसारांत फिरत असतो. (*'केवलात्मानुभावेन स्वमायां त्रिगुणात्मिकाम्। संक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिन्दम।। तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजन्तीं विश्वतोमुखम्। यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान्।। यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां संतत्य वक्त्रतः। तथा विहृत्य भूयस्तां ग्रसत्येवं महेश्वरः।।'* भा.पु. ११:९:२२-२३.)

**देह**सुद्धां गुरूच आहे हे सांगतात. देह कोल्ह्याकुत्र्यांसारख्या परक्यांचे भक्ष्य (**पारक्यात्**) होत असल्याने त्याच्यापासून विवेकाचे (**बोध**) शिक्षण मिळते. मातेचे रक्त ('रज') आणि पित्याचे रेत या दोन मलांपासून देहाची उत्पत्ती (**उद्भव**) होते आणि मृत्यू (**क्षय**) तर जन्माच्या आधीपासूनच त्याच्या मागे लागलेला आहे. असा घृणास्पद देह सतत धारण करणे ह्यापेक्षा वैराग्याला अधिक मोठे कारण काय असूं शकते? विष्णुपुराणात म्हटले आहे की आपल्या देहाच्या दुर्गंधीला जो माणूस विटत नाही त्याला वैराग्य व्हायला दुसरा काय उपदेश करावा? स्वतःचे आणि स्वकीयांचे पोषण करणारा (**आत्म+इष्ट+भृत्**) सदैव सुखाची अभिलाषा बाळगणारा (**प्रियेच्छुः**) हा देह, दुसऱ्या वृक्षाचे बीज निर्माण करून सुकणाऱ्या वृक्षाप्रमाणे जन्मांतराचे बीजरूप कर्म निर्माण करून नाश पावतो. इंद्रिये ह्या देहरूपी पतीला, सवतीसारख्या आपापल्या विषयांकडे खेचत असतात.

**तच्छ्रुत्वा समचित्तोऽभून् मुक्तसङ्गो यदुर्द्रुतम् ।।४०।।**

तत् श्रुत्वा यदुः द्रुतं सम+चिच्चः मुक्त+सङ्गः अभूत्।४०।

असे असले तरी आत्मज्ञानाचा अधिकार या देहाला असल्याने तो दुर्लभ मानून वरील चोवीस गुरूंकडून घेतलेल्या ज्ञानाने सर्व संगांचा त्याग करून निरहंकार वृत्तीने या भूमीवर अवशिष्ट प्रारब्ध भोगीत मी ह्या पृथ्वीवर संचार करतो. (*'देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्त्वनिधनं सततार्त्युदर्कम्। तत्त्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसङ्गः।।* भा.पु. ११:९:२५.)

हा यदुराजाला सर्व संग आणि त्याचे मूळ अहंकार यांना सोडून निर्विकारपणे प्रारब्ध भोगीत संचार करण्याचा अप्रत्यक्ष आदेशच होता. सद्‌गुरुकृपेने ज्ञान झाल्यानंतर संचित कर्माचा नाश होतो. प्रारब्ध मात्र भोगूनच संपवावे लागते, ह्या छांदोग्योपनिषदातील (६:१४:२) आणि ब्रह्मसूत्रातील (४:१:१९) सिद्धांताला हे धरूनच आहे. हा त्या अवधूताचा आदेश श्रवण करून यदुराजा, अधिकारी उपदेशकाच्या प्रभावाने, ज्याचे चित्त सम म्हणजे सर्वसंगपरित्याग केल्याने शत्रू, मित्र, उदासीन, आप, पर हे सर्व ज्याला सारखेच आहेत, तसा झाला; किंवा ज्याचे चित्त सम म्हणजे विकारशून्य आहे असा झाला. याज्ञवल्क्यस्मृतीत (प्रायश्चित्ताध्याय, ५४) म्हटल्याप्रमाणे कांट्यांनी ओरबाडणाऱ्यावर किंवा चंदनाने माखणाऱ्यावर जो सारखाच शांत ('अक्रुद्ध') आणि प्रसन्न ('परितुष्ट') असतो असा यदु झाला. हा सद्गुकृपेचा प्रभाव होय.

अधिकारी सद्‌गुरूंकडून श्रवण केल्याने हे ज्ञान यदूला लगेच झाले. कठोपनिषदांत प्रतिपादल्याप्रमाणे (१:२:७-८) या ब्रह्मज्ञानाचा निपुण वक्ता ही नवलाईचीच गोष्ट आहे; तसेच ह्या ज्ञानाची प्राप्तीही कुणा विरळ्या भाग्यवंतालाचा होते. अनधिकारी वक्त्याकडून हे समजणे शक्य नाही. स्वरूपसाक्षात्कार झालेल्या गुरूविना ह्या अचिंत्य आणि सूक्ष्मतम

ज्ञानात गती होत नाही. (*'अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः। सर्वसङ्गविनिर्मुक्तः समचित्तो बभूव ह।।'* भा.पु. ११:९:३३.)

असे **हे परमार्थाचा उपदेश करणारे गुरू नाहीत तर आपल्या बुद्धीने केलेले असंभावनादि दोषांचे निराकरण करणारे गुरू आहेत** हे लक्षात घ्यायला हवे. बृहदारण्यक उपनिषदांत (३:९:२७) याज्ञवल्क्याने ह्याच औपनिषद पुरुषाविषयी शाकल्याला विचारले होते आणि त्याला उत्तर देतां न आल्याने त्याचे मस्तक गळून पडले होते. वरील ३८ श्लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी अवधूतगीता (दत्तपुराण ४५:८ च्या टीकेत) असे नांव देऊन ते श्लोक तिथे तसेच दिले आहेत.

## प्रह्लादास उपदेश

आतां चार श्लोकांत (दत्तप्रभूंनी) प्रह्लादावर केलेल्या अनुग्रहाचे संक्षेपाने वर्णन केले आहे. हाच विषय श्रीमहाराजांनी श्रीमद्दत्तपुराणाच्या १५ व १६ व्या अध्यायात विस्ताराने मांडला आहे. त्या अध्यायांतील संबंधित श्लोक एकत्र करून ते स्तोत्रसंग्रहात 'श्रीदत्तात्रेयहृदयम्' या नांवाने प्रसिद्ध झाले आहे. अवधूतगीतेप्रमाणेच याही आख्यानाचे मूळ श्रीमद्भागवत पुराणात आहे. विषयाची मांडणी, शब्दयोजना इत्यादीही भागवतातील मूळ आख्यानाला अनुसरूनच आहेत. कांही कांही श्लोक तर जवळ जवळ सारखेच आहेत. ह्या दोन्ही स्रोतांचा उपयोग करीतच आपण ह्या चार श्लोकांची टीका पाहणे उद्बोधक ठरेल.

भागवतपुराणात सप्तम स्कंधांत नारद-युधिष्ठिर संवादात हे आख्यान नारदांनी सांगितले आहे. बालपणापासून भागवत धर्मात रमलेला असूनही प्रह्लादाला आत्मज्ञानाच्या अभावाने परम शांतीची प्राप्ती झाली नाही. त्यामुळे उदासीन वृत्तीने शिकारीच्या निमित्ताने तो आपल्या लवाजम्यासह रानावनात संचार करीत असतां कावेरीच्या तीरी सह्याद्री पर्वतावर त्याला सद्भाग्याने, धुळीच्या लेपाने ज्याचे मलापहारक तेज झांकलेले आहे,

**कष्टसंसारादिहेतु-प्राणार्थेहापनुत्तये । वैराग्यतोषदमधुकृन् महाहिसुशिक्षितम् ।।४१।।**

कष्ट+संसार+आदि+हेतु+प्राण+अर्थ+इहा अपनुत्तये वैराग्य+तोष+दं मधुकृत्+महा+अहि+सुशिक्षितम्..।४१।

असा एक अवधूत भूमीवर पहुडलेला दिसला. भागवतात अवधूत शब्दाचा उपयोग न करता त्याचा आजगर मुनि असा निर्देश केला आहे. त्याच्या बोलण्याचालण्यावरून किंवा इतर बाह्य चिह्नांवरून लोकांना त्याच्या वर्णाचा वा आश्रमाचा कांहीच पत्ता लागत नव्हता. त्याच्या पायांवर मस्तक ठेवून प्रह्लादाने त्याला नमस्कार केला, त्याची विधिवत् पूजा केली आणि तो महाभागवत दैत्य त्याला नम्रपणे प्रश्न करू लागला. 'महाराज! आपण कांही उद्योग करतांना दिसत नाहीत आणि निर्धन आहांत तरी एखाद्या भोगवान पुरुषाप्रमाणे आपला देह पुष्ट दिसतो. खरे तर उद्योगाने धन संपादन केल्यावर आहार-विहारादि इष्ट भोग प्राप्त झाल्यानेच माणसाचा देह असा पुष्ट होतो. आपण तर ज्ञानी, निपुण, वाक्पटु आणि कार्यक्षम असूनही इथे कांहीच न करता झोपलेले दिसता! तरीही आपले शरीर पुष्ट कसे आहे? आपल्याला प्राण किंवा धन यांची कांहीच चिंता दिसत नाही. या निर्मनुष्य ठिकाणी आपल्याला कशाचेच भयही वाटत नाही. आपले हे चरित्र खरोखर अतर्क्य आहे! कृपया, आपण आपल्याला योग्य वाटल्यास, मला पडलेल्या या प्रश्नाचे उत्तर द्यावे.' प्रह्लादाने नम्रपणे आणि साक्षेपाने, जिज्ञासापूर्वक विचारलेल्या या प्रश्नाने संतुष्ट झालेल्या परमकारुणिक अत्रिपुत्र दत्तप्रभूंनी, 'सगुण साक्षात्कार होऊनही हा अजून अज्ञानीच आहे' हे जणू जाणूनच कृपापूर्ण स्मित करीत बोलण्यास आरंभ केला. 'दैत्यकुलात जन्मूनही आपल्या भक्तीने नरसिंहाला अवतार घ्यायला लावणारा नारदमुनींचा शिष्य तूच आहेस ना? तुझ्या हृदयांत भगवान नारायणांचा निरंतर निवास आहे आणि तू शुद्ध अव्यभिचारी भक्तीने, सूर्याने अंधार पळवावा तसे, अज्ञान नष्ट करतोस. तूं अंतःकरणाच्या शुद्धीच्या इच्छेने हे प्रश्न विचारीत असल्याने मी तुला सांगतो. ऐक!'

'मी अज्ञानवश दुष्पूर वासनासरितांच्या लाटांत वाहात कर्मगतीने अनेक योनीत फिरत फिरत अखेर स्वर्ग, मोक्ष आणि नरक यांचे द्वार असलेल्या ह्या मनुष्य जन्माला आलो. इथे मी पाहिले की सुखासाठी सर्वच धडपडतात पण त्यांच्या वाटाला दुःखच येते.

**प्रऱ्हादायाप्यात्मतत्त्वं प्राहेदं भगवान् परम् । स्वरूपं सुखमीहोप-रतिस्तनुरशाश्वतान् ।।४२।।**
**दृष्ट्वा भोगान्संविशन्सन् स्वपेन्नेतः परं हितम् ।**

इदं आत्म+तत्त्वं भगवान् प्रऱ्हादाय अपि प्राह। स्वरूपं सुखं इहा+उपरतिः तनुः।४२। भोगान् अशाश्वतान् दृष्ट्वा संविशन् सन् स्वपेत्। इतः परं हितं न।

त्यामुळे **दुःखासारखेच सुखही अनायासच मिळते** असा विचार करून मी सुखासाठी प्रयत्न करण्याचे सोडून दिले. खरे तर स्वरूपतः आपण (आत्मा) सुखरूपच असतो. प्राण आणि धन यांची लालसाच या कष्टमय संसाराचे मूळ कारण आहे. ती घालवण्यासाठी मधमाशी आणि अजगर यांच्याकडून वैराग्य तसेच संतोष देणारे शिक्षण मी घेतले आहे.'

त्याच परमात्म्याच्या ज्ञानाचा उपदेश भगवान दत्तात्रेयांनी प्रह्लादाला केला. 'आपण खरे तर सुखरूपच आहोत. अज्ञानाने अनुभवाला येणारे हे जे दुःख आहे ते आपले वास्तविक स्वरूप नाही. विचार करून पाहिल्यास जिथे जिथे आपण (आत्मा) तिथे तिथे दुःख आहेच असे नाही. म्हणजेच दुःख आगंतुक आहे. ते आत्म्याचे स्वरूप होऊच शकत नाही. झोपेत असतांना किंवा समाधीत असतांना आत्मा साक्षित्वाने विद्यमान असूनही दुःखाचा पत्ताही नसतो. यावरून दुःख हे तापवलेल्या पाण्याच्या उष्णतेप्रमाणे तात्कालिक असते. स्वभावतः पाणी जसे थंड असते तसाच आत्माही सुखरूप आहे. हे अनुभवाला येत नाही त्याचे कारण त्याला अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश ह्या पांच क्लेशांचा अडसर असतो. हे क्लेश नष्ट झाले की आपला स्वाभाविक आनंद आपोआपच प्रकटतो. ह्यांच्यामुळेच आपण निरनिराळ्या वासनांच्या फेऱ्यांत सांपडतो. त्या वासनांचा उपशम झाला की आपले आंतरिक आत्मसुख आपोआपच प्रकटते. पाण्यासाठी व्याकुळलेल्या अभाग्याने शेवाळाने झांकलेले पाणी सोडून मृगजळाच्या मागे धावावे तसे हे लोक आपल्याच अंतरांतला आनंदाचा झरा सोडून सुखप्राप्तीसाठी वायांच धडपडत असतात. क्वचित् काकतालीय न्यायाने

ह्या धडपडीला यश आल्यासारखे वाटले तरी ते वैषयिक सुख मृगजळाप्रमाणे क्षणभंगुर असते. काम आणि अर्थ ह्यांच्या अभिलाषेनेच शोक, मोह, राग, द्वेष आणि श्रम होतात. अशा रीतीने चित्त विचलित झालेल्या पुरुषाला भय आणि चिंता यांच्या योगाने धड झोपही येत नाही. असे **हे ऐहिक भोग, आदि आणि अंत असलेले, क्षणभंगुर, अशाश्वत आहेत तसेच ते परतंत्रही आहेत** हे जाणून मी दैवाने प्राप्त होणाऱ्या भोगांचे सेवन निरिच्छपणे करूनही त्यांच्यासाठी कसलेही प्रयत्न न करतां स्वस्थ पडून राहतो. यदृच्छेने कांहीच न मिळाले तरी दैवानेच सर्व गोष्टी मिळतात असा निश्चय करून धीराने अजगरासारखा झोपून राहतो. यापेक्षां श्रेष्ठ असे दुसरे कल्याणकारक साधन नाही. मधमाशी आणि अजगर यांचे शिष्यत्व स्वीकारून मी प्राणाची तसेच वित्ताची इच्छा टाकून दिली आहे. द्रव्याचा लोभ सोडल्याने मला आता दंड, कर, राजस्व यांच्याद्वारा धन नेणाऱ्या राजाची, चोरांची वा याचकांची भीती उरली नाही. जीवाची आशा सोडल्याने मी हिंस्र प्राणी, शत्रू किंवा काळ यांनाही मुळीच घाबरत नाही. भ्रमर (मधमाशी) जसा निरनिराळ्या पुष्पांतून मिळेल तो रस ग्रहण करतो त्याप्रमाणे मी जास्ती-कमी, रुचकर-रुचीहीन, मानाने वा तिरस्काराने, ताजे-शिळे, रात्री किंवा दिवसा जे अन्न मिळेल त्यांत समाधान मानतो. मधमाशीप्रमाणे संग्रह केल्यास मालकाला मारून ते धन दुसरेच घेऊन जातात हे जाणून मी संग्रह करीत नाही. दैवाने मिळेल ते वस्त्र, वल्कल असो की रेशीम, अंगावर घेतो. कधी भस्मावर, कधी दगडावर तर कधी तरटावर, गावांत वा रानात, मी झोपतो. कधी असा धुळीने माखलेला असतो तर कधी कधी छान आंघोळ करून वस्त्रे आणि अलंकार घातलेला असतो. कधी कधी वस्त्रांशिवायच राहतो. कधी पायी, कधी गाडीत, कधी हत्तीवर तर कधी घोड्यावर बसून फिरतो. कधी मौनी असतो तर कधी वेड्यासारखा वागतो. व्यक्ती तितक्या प्रकृती असतात हे ध्यानात घेऊन मी ना कुणाची निंदा करतो ना स्तुती! (*'नाहं निंदे न च स्तौमि स्वभावविषमं जनम्।'*) परमेश्वराजवळ सर्वांचेच भले चिंतितो. ब्रह्माचीच ओढ, ब्रह्मावरच निष्ठा असलेला मी ब्रह्मरूप आहे आणि सर्वांना ब्रह्मबुद्धीनेच पाहतो. सुसंस्कृत ब्राह्मण, अंत्यज, गाय किंवा श्वान हे मला सारखेच आहेत.' (*'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।।'* भ.गीता ५:१७.)

**हुनेद्विकल्पं चित्तौ तां मनस्यर्थभ्रमे तु तत् ।।४३।।**
**वैकारिके तं मायायां तां स्वस्मिन्विरमेत्ततः । इत्युक्त्वा विरराम‌ाजः प्रन्हादोऽप्यभवत्तथा ।।४४।।**

विकल्पं चि;त्तौ हनेत् । तां अर्थ +भ्रमे मनसि (हुनेत्) तत् तु.. ।४३। वैकारिके (हुनेत्) तं मायायां (हुनेत्) । तां स्वस्मिन् (हुनेत्) प्रन्हादः अपि तथा अभवत्।४४।

आतां दत्तप्रभू हा स्वरूपानंद कसा प्राप्त करायचा तो योग सांगत आहेत. ‘प्रथम विकल्पाचा चित्तांत लय करावा. ते चित्त मग विषयांत भुलणाऱ्या मनात स्थिरवावे. त्या मनाचा वैकारिक अहंकारांत (पर्यायाने बुद्धीत अथवा विज्ञानमय कोशांत) लय करावा. ती बुद्धी महत्तत्त्वसहित मायेत स्थिरवावी. शेवटी त्या मायेचा आत्म्यांत (**स्वस्मिन्**) विलय करावा. **विकल्प** म्हणजे इंद्रिये आणि **चित्ति** म्हणजे त्यांची विषयाकडची धांव. पहिल्यांदा इंद्रियांना विषयांपासून वळवून मनांत स्थिर करावे. हाच पतंजलींनी सांगितलेला **प्रत्याहार** होय. त्यानंतर ते विषयरहित झालेले मन बुद्धीत विरवावे. हीच **धारणा**. ही स्थिरावलेली बुद्धी महत्तत्त्वांत आणि मायेत विरवावी (**ध्यान**) आणि अंती ती माया आत्मस्वरूपांत स्थिर करावी (**समाधी**). इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, अव्यक्त (महत्, माया) आणि पुरुष ही परंपरा कठोपनिषदांत (१:३:१०) स्पष्ट केली आहे. हीच प्रक्रिया तेथे पुढीलप्रमाणे सांगितली आहे. ‘सूज्ञ माणसाने वाचेचा (इंद्रियांचा) संयम मनांत करावा; त्या मनाचा बुद्धीत (*‘ज्ञानआत्मनि’*), त्या बुद्धीचा महत्तत्त्वात आणि महत्तत्त्वाचा लय प्रशांत अशा आत्मतत्त्वात करावा (१:३:१३). ‘इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, महत्तत्त्व, आणि आत्मा हे एकापेक्षा एक सूक्ष्म, व्यापक आणि आंतरिक आहेत. अशा रीतीने हा अनात्म पदार्थांचा अनुक्रमाने विलय श्रुतीने *‘सा काष्ठा सा परा गति’* महणून प्रतिपादलेल्या आत्मरूपांत करावा. ‘तो नित्य, शुद्ध, बुद्ध, सर्वभेदातीत परमात्माच मी आहे’ हे पक्के झाले की संसारातून मुक्त होशील. हे माझे गूढतम हृदयच मी तुझ्यापुढे उघडे केले आहे. त्याचे सावधानतेने मनन कर. हे माझे हार्द अत्यंत नम्र आणि श्रद्धावंतालाच सांगावे.’ हे स्वतःला हृदयांत सामावणारे रहस्य सांगून दत्तप्रभू निःशब्द झाले. प्रह्लादही त्या उपदेशाने प्राप्त झालेल्या अनुभवाने तसाच - निःशब्द आणि तटस्थ झाला.

**देवोऽर्जुनायापि योगं प्राहाष्टाङ्गं निवृत्तये । सद्वाच्याविद्याशबल-ब्रह्मातोऽव्यक्तकं महत् ।।४५।।**

देवः अर्जुनाय अपि निवृत्तये अष्टाङ्ग+योगं प्राह। सत्+वाच्य अविद्या+शबल+ब्रह्मातः अव्यक्तकं, (अव्यक्तात्)महत् ।४५।

आतां कार्तवीर्य अर्जुनाचा अनुग्रह सांगत आहेत. देव याचा अर्थ द्योतनात्मक म्हणजेच स्वयंप्रकाश दत्तप्रभू असा आहे. 'त्याच्या प्रकाशानेच हे सर्व उजळलेले आहे,' या मुंडकोपनिषदाच्या (२:२:१०) आणि 'जे सूर्य, चंद्र आणि अग्नी यांच्यांत प्रविष्ट झालेले तेज आहे ते माझेच आहे' ह्या गीतावचनाचा (१५:१२) हाच अभिप्राय आहे. कार्तवीर्याला संसारातून निवृत्त होण्यासाठी दत्तप्रभूंनी अष्टांगयोगाचा उपदेश केला. त्यांपैकी, पातंजल दर्शनानुसार अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम आणि तप, संतोष, शौच, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान हे पांच नियम ही पहिली दोन अंगे आहेत. शांडिल्य उपनिषदांत आणि सूतसंहितेत अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, आर्जव, क्षमा, धृति (धैर्य), मिताहार, शौच हे दहा यम तसेच तप, संतोष, आस्तिक्य, सिद्धान्तश्रवण, ईश्वरपूजन, दान, ह्री (लज्जा), मति (सद्बुद्धी), जप आणि व्रताचरण हे दहा नियम मानले आहेत. ह्यांची लक्षणे विस्तारभयाने दिली नाहीत. ती त्या त्या ग्रंथांतून पाहावीत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे. कुणी यम आणि नियम हे स्वाभाविक मानवधर्म असल्याने उरलेली सहाच अंगे मानून 'षडंग' योगाचे प्रतिपादन करतात तर कुणी समाधी हे योगाचे फळ मानून 'सप्तांग' योगाचे प्रतिपादन करतात. ह्या ठिकाणी भगवंतांनी, समाधीचे सविकल्प आणी निर्विकल्प असे दोन भाग करून, एकाचा समावेश अंगांत करून 'अष्टांग' योगाचा उपदेश केला आहे.

**निवृत्तये** या शब्दांतून अध्यारोपजनित संसाराचा अपवादाने निरास करून त्यापासून मुक्त होणे हा अर्थ सुचविला आहे. ह्या अध्यारोपाचे स्पष्टीकरण पुढे सत् या पदापासून *'सदेव सोम्य इदमग्र आसीत्'* ह्या छांदोग्य उपनिषदाच्या वचनाद्वारे सांगितले आहे. सत् म्हणजे जो सदैव, तिन्ही काळात असतो तो, म्हणजेच आत्मा होय.

**ततस्ततोऽहङ्कारोऽस्मात् पञ्चतन्मात्रखाद्यतः । जगत्सकार्यविकृत-भूतान्युर्वात्मवर्ष्म तत् ।।४६।।**

ततः अहङ्कारः, अस्मात् ख्आदि पञ्च+तन्मात्र, अतः जगत् । स+कार्य+विकृत+भूतानि उरु+आत्म+वर्ष्म । तत् ।४६।

छांदोग्यातच पुढच्या अनेक मंत्रांत सदेव न म्हणता *'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किञ्चन मिषत्'* असे म्हटले आहे. यावरून देश, काल, वस्तू या त्रिविध परिच्छेदविरहित आत्माच 'सत्' शब्दाने अभिप्रेत आहे. 'अतति' सर्वत्र जाणारा किंवा सर्वांना व्यापणारा तो आत्मा. त्यालाच नित्य, शुद्ध, बुद्ध इत्यादि लक्षणांचे निरतिशय ब्रह्म ('बृह' धातूपासून वाढणारे) म्हणतात. प्रलयकाली आधीच्या सृष्टीतील सर्व प्राणिमात्रांनी केलेली पण परिपक्व न झालेली कर्मे, मायाविशिष्ट ब्रह्मात राहून हळूहळू पचत (पिकत) असतात. त्या कर्मांनाच अविद्या म्हणतात. आणि त्यांनी युक्त असलेल्या ब्रह्माला 'अविद्याशबलब्रह्म' म्हणतात. हीच कर्मे परिपक्व झाली की त्यांचा भोग देण्यासाठी ह्या ब्रह्माला पुन्हा जगत् निर्माण करण्याची इच्छा होते. हाच ऋग्वेदांत (१०:१२९:४) प्रतिपादलेला सर्वप्रथम प्रकटणारा 'काम म्हणजेच मनाचे बीज' होय. हेच शबलब्रह्म जगाचे अभिन्न निमित्त आणि उपादान कारण आहे. हेच स्वतःपासूनच जग निर्माण करते. घटाला जसे माती हे उपादान कारण आहे आणि कुंभार हे निमित्त कारण आहे तशी दोन कारणे सृष्टीला नाहीत. ह्या ब्रह्मापासून अव्यक्त म्हणजे माया जन्म घेते आणि मायेपासून महत् नांवाचे तत्त्व निर्माण होते. महत्तत्त्वापासून अहंकार, अहंकारापासून पंचतन्मात्रासहित आकाश, वायू, तेज, आप आणि पृथ्वी ही पंचमहाभूते उत्पन्न होतात. आतां कुणी विचारतील की तैत्तिरीय उपनिषदात (२.१.१) तर 'आत्म्यापासून आकाश संभवते' असे म्हटले आहे. तर अव्यक्त शब्दाने दर्शविलेली माया ब्रह्माची शक्तीच आहे. तिला स्वातंत्र्य नाही. 'न तस्य कार्यं कारणं च विद्यते' असे श्वेताश्वतरोपनिषदांत म्हटलेच आहे. इथे अव्यक्तांतच अंतर्भूत असलेल्या महत् आणि अहंकार यांचा स्पष्ट वेगळा उल्लेख केला आहे एवढेच. आत्म्यापासून आकाश जन्म घेते या श्रुतिवाक्याशी कसलाच विरोध नाही.

आरंभवाद आणि परिणामवाद यांचे खंडन इथे विस्तारभयाने केले नाही. हे सर्व ब्रह्मसूत्रभाष्याच्या दुसऱ्या अध्यायात पाहावे.

**जागृतिर्गोभिरर्थाप्तिर् विश्वस्तदभिमानवान् । सकार्यशुद्धभूतानि लैङ्गात्मात्मा स भौतिकः ।।४७।।**
**हिरण्यगर्भः स्वप्नः स्यात् करणोपरमेऽर्थयुक् । प्राक्संस्कारोत्थानुभूतिस् तैजसोऽत्राभिमानवान् ।।४८।।**

गोभिः अर्थ+आप्तिः जागृतिः । विश्वः तत्+अभिमान+वान् । स+कार्य+शुद्ध+भूतानि लैङ्ग+आत्मा सः भौतिकः ।४७। हिरण्य+गर्भः स्वप्नः स्यात् करण+उपरमे+अर्थ+युक् । प्राक्+संस्कार+उत्थ+अनुभूतिः तैजसः अत्र+अभिमान+वान् ।४८।

अगदी शेवटच्या कार्यापर्यंत आत्माच सर्वांचे उपादान कारण असल्याने अव्यक्तापासून म्हणजे अव्यक्तभावाला प्राप्त झालेल्या आत्म्यापासून असे समजावे. आकाशादि पांच महाभूतांपासून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणांची वाढ झाली. म्हणून पंचमहाभूतांपासून जगत् झाले. **कार्या**सहित म्हणजेच विषयांसहित **विकृत** म्हणजे पंचीकृत भूतांपासून स्थूल देह (**'उरुवर्ष्म'**) आणि विराट (**'तत्'**) उत्पन्न झाले.

या स्थूल देहांत **'गो'** म्हणजे इंद्रियांपासून **'अर्थाप्ति'** म्हणजे विषयांचे ग्रहण ज्या अवस्थेत होते ती जागृती अवस्था होय. स्थूल देह आणि जागृती यांचा अभिमानी जीवाला **'विश्व'** म्हणतात. शुद्ध म्हणजे अविकृत, अपंचीकृत महाभूतें आणि त्यांची कार्ये पंचतन्मात्रा यांचा मिळून आत्म्याचा लिंगदेह, ज्याला सूक्ष्म देह असेही म्हणतात, तो होतो. तो स्थूलदेहाप्रमाणेच भौतिक (भूतांपासून झालेला) आहे.

समष्टीच्या लिंगदेहालाच **हिरण्यगर्भ** असे नांव आहे. इंद्रियांचा उपशम झाला की हा सूक्ष्म देह पूर्वीच्या (**प्राक्**) जागेपणीच्या संस्कारांच्या स्मृतीने विषयांचा अनुभव घेतो. तीच **स्वप्ना**वस्था होय. लिंगदेह आणि स्वप्नावस्था यांच्या अभिमानी जीवाला (जाग्रतीतल्या विश्वालाच) **'तैजस'** असे नांव आहे. बृहदारण्यकांत (४.३.९) या अवस्थेत पुरुष (जीव) स्वयंप्रकाश होतो, स्वप्नांतील सृष्टीची रचना तोच करतो असे म्हटले आहे.

**द्विहेत्वात्मावित्साभासा-ऽव्याकृतं ज्ञानसंहृतिः । धीहेत्वात्मस्थितिः सुप्तिर्मानी प्राज्ञोऽत्र तत्परम् ।।४९।।**

द्वि+हेतू आत्म+अवित्स +आभासा अव्याकृतम् । धी+हेतु+आत्म+स्थिति सुप्तिः । अत्र प्राज्ञः । तत्+परं।४९।

ह्या दोन (**'द्वि'**) देहांचे कारण (**'हेतू'**) असणारे आत्म्याचे अज्ञान (**'आत्म+अवित्'**) आणि आभासरूप जीव (**'स+आभासा'**) यांना **अव्याकृत** ही संज्ञा आहे. अस्पष्ट दशेत असलेले म्हणजे अव्याकृत. स्पष्टपणे व्यक्त न झालेले, आकाराला न आलेले ते अव्याकृत! *'तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्'* (बृहदारण्यक उ. १.४.७) ह्या श्रुतीप्रमाणे उत्पत्तीच्या पूर्वी जग अव्याकृत असते. त्या वेळी पंचभूतादींचे हे जग सत्याचे अधिष्ठान जे ब्रह्म त्यांत रोंवलेले असते. ह्याचा आत्मतत्त्वाच्या ज्ञानाने लय होत असल्याने त्याला 'सत्' म्हणजे खरे म्हणतां येत नाही, पुढे दृश्य स्वरूपांत व्यक्त होणार असल्याने 'असत्' म्हणजे खोटे म्हणतां येत नाही. सत् आणि असत् हे परस्परविरोधी धर्म असल्याने त्याला 'सदसत्' असेही म्हणतां येत नाही. आत्मस्वरूपापासून त्या अव्याकृताला भिन्न म्हणावे तर द्वैत मानावे लागते आणि आत्म्याच्या श्रुतिप्रतिपादित अद्वितीयत्वाला बाध येतो. त्याला आत्म्याशी अभिन्न मानले तर त्यांच्यासारखा आत्माही जड ठरतो. भिन्न आणि अभिन्न ह्या दोन्ही परस्परविरोधी स्थिती एकत्र असू शकत नाहीत म्हणून त्यांना भिन्नाभिन्नही म्हणतां येणार नाही. हे अव्याकृतच पुढे जगात परिणत होत असल्याने त्याला निरवयव म्हणतां येत नाही. आकाशादि निरवयवांचीही उत्पत्ती त्यापासून होत असल्याने त्याला सावयवही म्हणतां येत नाही. अशा रीतीने अव्याकृताला **अनिर्वचनीय** म्हणावे लागते. तेसुद्धा ब्रह्माशी ऐक्याच्या ज्ञानाने नाहीसे होते. हाच **कारणदेह** होय. सर्व प्रकारच्या ज्ञानांचा उपसंहार (**ज्ञानसंहृतिः**) होऊन बुद्धी (**धियो**) कारणदेहात स्थिरावते ती सुषुप्ती (**निद्रा**) अवस्था जाणावी. कारणदेह आणि सुषुप्ती यांचा अभिमानी झालेला जीव **प्राज्ञ** म्हणवतो. तैजसाचाच सुषुप्तीत प्राज्ञ होतो. इथे स्पष्टपणे सांगितलेला नसला तरी विश्व, तैजस आणि प्राज्ञ यांच्यातला अभेद लक्षांत घेतला आहे. जगाच्या कारणरूपाने प्राज्ञ नांवाच्या आत्म्याचे चिंतन करावे (*'जगत्कारणरूपेण प्राज्ञात्मानं विचिन्तयेत्।'*) असे श्रीमच्छंकराचार्यांच्या पंचीकरणावरील वार्तिकांत (श्लोक ४५). **तत्परं** हे पद पुढच्या श्लोकाला जोडून वाचावे.

**शुद्धादिलक्ष्मचिन्मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते । यमादिवान्पीठवित्सद्-गुरूक्त्यापूर्य चेडया ।।५०।।**

(तत्+परं) शुदाध+आदि+लक्ष्म+चित्+मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते यम+आदि+वान् पीठ+वित् सत्+गुरु+उक्त्या चेड्या आपूर्य.. ।५०।

बुद्धी कारणदेहांत स्थिरावली की वृत्ती उठत नाहीत. वृत्तींवर बुद्धीचा प्रभाव असतो तसाच बुद्धीच्या साक्षीचा - प्रत्यगात्म्याचाही, असतो. बद्धीतून उद्‌भवणाऱ्या सर्व वृत्ती तापलेल्या लोखंडाच्या ठिणग्यांसारख्या आत्म्याच्या चैतन्याच्या स्पर्शाने तेजाळलेल्या असतात (तैत्तिरीय उ. भाष्यवार्तिक). अशी ही बुद्धी वटवृक्ष जसा वडाच्या बीजांत सामावावा तशी कारणदेहांत सामावून राहते. आतां त्यांच्या म्हणजे जाग्रती, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या पलीकडे असलेले शुद्ध, बुद्ध, नित्य इत्यादि लक्षणांनी युक्त असे चैतन्यमात्र ब्रह्म गुरूंनी उपदेशिलेल्या *'तत्त्वमसि'* (ते ब्रह्म तू आहेस) ह्या महावाक्याने लक्षिले जाते.

श्लोकाच्या उत्तरार्धापासून हठयोगाचे निरूपण केले आहे. **यमनियम** अंगी बाणविलेल्या आणि आसनाचा जय केलेल्या साधकाने गुरूंच्या निर्देशाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली पुढे सांगितलेल्या प्राणायामाचा अभ्यास करावा. कठोपनिषदांतील (१.२.९) सिद्धांताप्रमाणे आपली 'बुद्धी चालवून योगाभ्यास करूं नये'. *'ईडया आपूर्य'* ही पदे पुढच्या श्लोकाशी जोडून वाचावीत.

**ईडा** या डाव्या नाकपुडीने बाहेरचा प्राण जोराने आंत ओढून पूरकाच्या चौपट काळ जालंधरबंधाने (गळा छातीशी दाबून घरून) पोटांत धरून ठेवावा, म्हणजेच **कुंभक** करावा. हा कुंभक जपसहित वा नुसता (जपरहित) करतां येतो. नंतर दुसऱ्या म्हणजे उजव्या **पिंगला** नाडीद्वारा उड्डियान बंध लावून (पोट आंत ओढून), हळूंहळूं प्राण बाहेर सोडावा, म्हणजेच **रेचक** करावा. वेगाने किंवा जोरांत रेचक केल्यास बलहानी होऊ शकते. दुसरा प्राणायाम उलट रीतीने, म्हणजे पिंगलेने पूरक आणि इडेने रेचक करावा. नंतर पुन्हां पहिल्यासारखा असे दहा कुंभक दिवसांतून तीन वेळां करीत गेल्याने तीन महिन्यांत प्राणजय होतो. जिंकलेल्या प्राणाने इंद्रिये विषयांपासून मनांत बांधावी. हा **प्रत्याहार** होय.

**धारयेदात्मन्यचलं विक्षिप्तं शश्वदात्मनि । स्थिरीकुर्वन्छ्रुतं ध्यायेच्छ्रुतियुक्त्या निरासतः ।।५२।।**
**विजातिप्रत्ययस्यान्य-प्रवाहीकरणं भजेत् । गुरूक्तं षड्लिङ्गवित्तं तं भागत्यागलक्षितम् ।।५३।।**

आत्मनि अचलं धारयेत् । विक्षिप्तं शश्वत् आत्मनि स्थिरीकुर्वन् श्रुतं ध्यायेत् । श्रुति+युक्त्या निरासतः... ।५२। (श्रुति+युक्त्या निरासतः) विजाति+प्रत्ययस्य अन्य+प्रवाही+करणं भजेत् । गुरु+उक्तं षड्+लिङ्ग+वितं भाग+भाग+त्याग+लक्षितं ।५३।

चित्त स्थिर करून नाभ्यादि देशांत धरून ठेवावे. मग ते मन *'देशबन्धश्चित्तस्य धारणा'* या पतंजलींच्या वचनानुसार हीच **धारणा** होय. दैवयोगाने मन विक्षिप्त (चंचल) होऊन विषयांत गुंतले तर सारखा पुनःपुन्हा अभ्यास करून ते स्थिर करावे आणि गुरूंकडून श्रवण केलेल्या तात्पर्याचे, आत्मस्वरूपाचे ध्यान करावे.

**तात्पर्यनिर्णयाचे सहा निकष -** श्रुतींना, वेदांना अनुकूल अशा युक्तीने, तर्काने द्वैताच्या संस्कारांचे निरसन करीत, गुरुमुखांतून श्रवण केलेल्या, उपनिषदांत प्रतिपादलेल्या, अद्वैत आणि प्रत्यगात्म्याशी एकरूप असलेल्या परब्रह्म स्वरूपाच्या अनुभूतीत प्रवाहित करावे. गुरूंनी वेदांतवाक्याने उपदेशिलेले ब्रह्मरूप वेदांताच्या अभ्यासानेच जाणून घ्यावे, कारण *'तत्तु समन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार वेदांतांतच ब्रह्मरूपाचे प्रतिपादन आहे. या गुरूपदिष्ट ब्रह्मरूपाचे तात्पर्य श्रीमदादिशंकराचार्यांनी सांगितल्याप्रमाणे उपक्रमादि सहा लिंगांच्या आधारेच करावे. *'उपक्रमोपसंहारावभ्यासोऽपूर्वता फलम्। अर्थवादोपपत्तौ च लिङ्गं तात्पर्यनिर्णये।'*. छांदोग्योपनिषदांत ब्रह्माविषयी केलेल्या प्रतिपादनांत 'सदेव सोम्य' असा 'उपक्रम' करून (६.२.१) *'स आत्मा तत्त्वमसि'* असा 'उपसंहार' केला आहे हे पहिले लिंग (१). वरचेवर अनेक वेळां आलेले 'तत्त्वमसि' (ते ब्रह्म तू आहेस) हे वाक्य म्हणजे अभ्यास नांवाचे लिंग आहे (२). शब्दावांचून (प्रत्यक्ष, अनुमान आदि) अन्य प्रमाणानी त्या ब्रह्माचे ज्ञान होत नाही ही 'अपूर्वता' हे तिसरे लिंग आहे (३). हा एक आत्मा जाणला की सर्व जाणले जाते हे 'फल' होय (४). जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय, त्यांत प्रवेश आणि त्याचे नियमन हे पांच 'अर्थवाद' होत (५). मृत्तिका, सुवर्ण आदि दृष्टांत हे उपपत्ती नांवाचे सहावे लिंग आहे (६).

**तत्त्वमस्यादिवाक्यार्थं सोऽहमात्मेत्यभेदतः । नादेयं नश्वरं चित्तं लये सम्बोधयेत्पुनः ।।५४।।**

भाग+त्याग+लक्षितं तत्+त्त्वं+असि+आदि+वाक्य+अर्थम् सः अहं आत्मा इति अभेदतः नश्वरं न आदेयम्। लये पुनः सम्बोधयेत्।५४।

पुराणातही (बृहत्संहिता) 'गुरुमुखांतून वेदांतवाक्यांचे श्रवण केल्यावर उपक्रमादिलिंगांनी त्यांच्या तात्पर्याचा निश्चय करावा. नंतर त्या वाक्याच्या अनुसंधानाने तो अर्थ ग्रहण करणारे मनन करावे. श्रवण आणि मनन यांच्यातील एकाग्रता म्हणजे निदिध्यासन. आत्मज्ञान उत्पन्न होण्यासाठी बुद्धिमान साधकाने विविध तर्कांनी तटस्थ आणि 'अतत्' संस्कारांची व्यावृत्ती करीत, अंतरंग श्रवण, मनन आणि चिंतन ही केली पाहिजेत. तसेच शमदमादि षटकाचाही अभ्यास करावा.' ह्याच श्रवण-मनन-निदिध्यासनांचा निर्देश कहोळ ब्राह्मणात याज्ञवल्क्यांनी 'पांडित्य, बाल्य आणि मौन' या शब्दांनी केला आहे. 'बाल्य' याचा बालवय किंवा निर्बंध स्वैराचार असा होऊ शकत नाही कारण हे दोन्ही मननाला उपयोगी तर नाहीतच पण प्रतिबंधकच आहेत. *'अनाविष्कुर्वन्नन्वयात्'* ह्या ब्रह्मसूत्रानुसार (३.४.५०) राग, द्वेष, मान, अपमान ह्यांच्या प्रभावाने होणाऱ्या बाह्य प्रवृत्तीचा त्याग करून निरागस, शुद्ध भावांत राहण्याला बाल्य म्हटले आहे. 'ब्राह्मणाने (श्रवणाने) पांडित्य पूर्णपणे संपादन करून (मननाचा अभ्यास करीत) 'बाल्य'त्वाने राहावे. बाल्य आणि पांडित्य आत्मसात केल्यावर (निदिध्यासनासाठी) 'मौन' धरावे.' (बृहदारण्यक उ. ३.५.१). यांत मौनाचा ब्रह्मसूत्रानुसार (३.४.४७) विध्यात्मक अर्थ घ्यावा. अंतःकरणातून बलिष्ठ भेदवासनांचा प्रभाव नाहीसा करण्यासाठी ज्ञानाभ्यास निरंतर चालविण्यासाठी निदिध्यासनात्मक मौन धारण करायचा विधि सांगितला आहे. ध्यान वरचेवर करावे लागते. म्हणजे त्याची आवृत्ती करावी लागते. कोंडा बाजूला होईपर्यंत साळी कांडाव्या लागतात त्याचप्रमाणे ब्रह्मसाक्षात्कार होईतोंवर *'आवृत्तिरसकृदुपदेशात्'* या ब्रह्मसूत्राला (४.१.१) अनुसरून श्रवणादींची आवृत्ती आवश्यकच आहे. *'भागत्यागलक्षितम्'* हे पद पुढच्या श्लोकांतल्या 'तत्त्वमस्यादिवाक्यार्थम्' या पदाचे विशेषण आहे.

भागत्यागलक्षणेने सूचित होणाऱ्या ‘ते तू आहेस’ या वाक्याचे ‘तो (आत्मा) मी आहे’ असे अभेदतया चिंतन करावे. शब्दाचा अर्थ तीन प्रकारे लावतां येतो, मुख्य, गौण आणि लक्षणा. ब्रह्म हे अनिर्वचनीय असल्याने त्याचा मुख्य किंवा गौण अर्थ लावतां येत नाही. यासाठी लक्षणा वृत्तीनेच अर्थ लावला पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत ‘ते’ व ’तू’ या पदांची समानता (‘सामानाधिकरण्य’) दिसते. श्रीमच्छंकराचार्यांनी वाक्यवृत्तीत (४७) सांगितल्याप्रमाणे मुख्यार्थ घेतल्याने जर प्रमाणाशी विसंगत अर्थ निघत असेल, मुख्यार्थाविना येणाऱ्या प्रतीतीला लक्षणा म्हणतात. म्हणजेच ‘तत्’ आणि ‘त्वं’ पदांचा परस्परसंबंध ‘लक्ष्य’ आणि ‘लक्षणा’ असा होतो. लक्षणा तीन प्रकारची असते. जहती, अजहती आणि भागत्याग (*जहत्यजहती*). ज्या वेळी मुख्यार्थ पूर्णपणे सोडून वेगळाच अर्थ काढला जातो तिला *‘जहल्लक्षणा’* असे म्हणतात. उदाहरणार्थ गंगेतला गोठा (*‘गंगायां घोषः’*) इथे वाहत्या नदीत गोठा असूं शकत नाही. म्हणून गंगेचा नदी हा अर्थ सोडून नदीचा कांठ असा अर्थ घेतल्यावर तो बरोबर जुळतो. लक्षणेच्या दुसऱ्या प्रकारांत मुख्यार्थाला जोडून आणखी अर्थ घ्यावे लागतात. ही ‘अजहल्लक्षणा’ होय. उदाहरणार्थ ‘कावळ्यापासून अन्न राख’ याचा अर्थ केवळ कावळेच नाही तर इतर सर्व प्राण्यापासूनही अन्नाचे रक्षण करावे असा केला पाहिजे. अन्यथा कावळे सोडून इतर प्राण्यांना अन्न खाऊ द्यायला मोकळीक आहे असा अर्थ निघेल. ह्या दोन्ही लक्षणा महावाक्याला लागत नाहीत. कारण ते आणि तू या पदांचे लक्ष्यार्थ एक असू शकत नाहीत आणि सर्वथा वेगळेही असू शकत नाहीत. यासाठी दोन्ही पदांचे समान अंश ग्राह्य धरून असमान अर्थ टाकले तर ‘लक्ष्यार्थ’ स्पष्ट होतो. जुना मित्र अनेक वर्षांनी भेटला की त्याची ओळख पटण्यासाठी ‘तो हा देवदत्त’ असे सांगावे लागते. फार पूर्वी दूरदेशी तरुणावस्थेत ज्याच्याशी मैत्री झाली तोच हा वृद्ध आत्तां इथे भेटतोय असा त्याचा अर्थ होतो. त्याचे वय, रूप, स्थान इत्यादि वेगळे आहेत पण नांव आणि मित्रत्व तसेच आहेत. अशा भिन्न किंवा विसंगत अर्थ सोडून उरलेल्या समान आणि सुसंगत अर्थांनी ओळख पटते. ‘ते तू आहेस’ या वाक्यात ‘ते’ पदाचा अर्थ मायेत प्रतिबिंबित झालेला ईश्वर आणि मायेचे अधिष्ठान ब्रह्म, असा वाच्यार्थ आहे आणि सत्य, ज्ञान, अनंत इत्यादि लक्षणांनी निर्दिष्ट चैतन्य हा ‘लक्ष्यार्थ’ आहे. ‘तू’ पदाने अविद्या, तिच्यात

प्रतिबिंबित झालेला जीव आणि अविद्येचे अधिष्ठान कूटस्थ चैतन्य हा वाच्यार्थ आणि साक्षीभूत चैतन्य हा लक्ष्यार्थ आहे. वरील देवदत्ताच्या उदाहरणाप्रमाणे इथे 'ते' आणि 'तू' या पदांचे वाच्यार्थ भिन्न असले तरी लक्ष्यार्थ निःसंशय एकच आहे. वस्तुतः ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला अंतःकरणाच्या उपाधींमुळे दुःखादि सांसारिक धर्म चिकटलेले भासतात.

**सोऽहमात्मेत्यभेदतः -** हा विरोध वास्तविक नसल्याने 'तो(च) मी आहे' असा त्यांचा अभेदच आहे. ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) श्रुतींनीही आत्मा शब्द ब्रह्म ह्या अर्थानेच स्वीकारला आणि प्रतिपादला आहे. अशा प्रकारें मनन आणि निदिध्यासन केल्यानेच आत्मसाक्षात्कार होतो. यावर असा आक्षेप घेतां येईल की वेदानुसार (केनोपनिषद १.५) तर आत्मा मनाचा विषय होऊं शकत नसल्याने त्याचे मनन कसे होईल? स्वयंप्रकाश आत्म्याला मन प्रकाशत नाही हे खरेच आहे. पण हा निषेध फक्त फलव्याप्तीचा आहे. इतर वस्तूंच्या मननाने ती वस्तू मनांत आकारते. हीच फलव्याप्ती. पण आत्मज्ञानासाठी वृत्तिव्याप्तीच पुरेशी आहे. अंधारांत पडलेली दोरी पहायला दिवा लागतो. दिवा मात्र इतर प्रकाशाच्या साधनाविना दिसतो. तसाच आत्म्याचा प्रकाश मनांत पडल्याने तो जाणवतो. ह्यालाच 'वृत्तिव्याप्ती' असे म्हटले आहे. त्यामुळेच बृहदारण्यक उपनिषदांत आत्मा 'मनानेच पाहावा' असे या अर्थानेच म्हटले आहे. पंचदशीतही (७.९२) म्हटले आहे, 'ब्रह्माच्या अज्ञानाचा नाश करण्यासाठी वृत्तिव्याप्तीचीच अपेक्षा आहे. ब्रह्म स्वतःच (अंतःकरणात) स्फुरत असल्याने त्याचा आभास होऊंच शकत नाही.' अभेदतः ह्या शब्दाने जीवात्मा (प्रत्यक्) आणि (पर)ब्रह्म यांची अखंडैकरसता सुचविली आहे. वाक्यवृत्तीत (३९-४१) सांगितल्याप्रमाणे, 'प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार अद्वितीय आणि आनंदघन असाच होतो. अद्वयानंदस्वरूप ब्रह्म हेच प्रत्यग्बोधाचे लक्षण आहे. आत्मा आणि ब्रह्म यांचे असे परस्पर तादात्म्य पक्के झाले की 'त्वं' पदाच्या अर्थाचे (जीवाचे) ब्रह्मापासून वेगळेपण आणि 'तत्' पदाची परोक्षताही तत्काल दूर होतात. तदनंतर जीवात्म्याची जाणीव पूर्णानंद अद्वितीय रूपानेच स्थिर होते.' जीवात्मा आणि परमात्मा यांचे अखंड एकरसत्व केवळ परस्पर तादात्म्यानेच सिद्ध होत नाही ह्या आक्षेपाचे निराकरण करण्यासाठी नीलकमलाचा

दृष्टांत देतात. नील आणि कमल ह्या दोन पदांत 'नील' हे विशेषण व 'कमल' हे विशेष्य असून त्यांचा मिळून अर्थ 'निळ्या रंगाचे कमळ' असा होतो. हे त्यांचे तादात्म्य असले ते अखंडैकरस नाहीत. नील हा गुण आहे आणि कमल हे द्रव्य आहे, हा भेद कायमच आहे. तसाच आत्मत्व आणि ब्रह्मत्व ह्यांच्यातला भेद राहणारच असे म्हणाल तर ते तसे नाही. नीलता ही कमळाशिवाय मेघ आणि इतर वस्तूंतही आढळते. तसेच कमळ हे लाल, पांढरे असे इतर रंगाचे असूं शकते. अर्थात् त्यांच्या अर्थांतच भेद असल्याने अखंडार्थ होऊं शकत नाही. आत्मत्व आणि ब्रह्मत्व हे मात्र एकमेकांशिवाय कुठेच आढळत नाही. विश्वरूपाचार्यांनी वाक्यवृत्तीत म्हटल्याप्रमाणे, 'आत्मता ही ब्रह्माशिवाय अन्य ठिकाणी आढळत नाही आणि ब्रह्मता आत्म्यावांचून कुठेच दिसत नाही. नीलोत्पलापेक्षां हे विलक्षण आहे.'

**नादेयं नश्वरं -** समाधीलाभासाठी ध्यानमार्गाचा अभ्यास करणाऱ्याला अष्टमहासिद्धींचे ऐश्वर्य हे विघ्नच आहे. त्याचा अंगीकार करूं नये.

**चित्तं लये सम्बोधयेत्पुनः -** ध्यानाभ्यास करतांना तमोगुणामुळे कदाचित् चित्ताचा लय होऊं लागला - झोंप येऊं लागली, तर त्याला पुनश्च जागवावे.

**विक्षिप्तं शमयेज्जह्यात् सकषायं समं वरम् । नास्वादयेद्रसं तत्र निःसङ्गः प्रज्ञया भवेत् ।।५५।।**
**निवातदीपवच्चित्तो ब्रह्मात्मा शून्यवृत्तिकः । कृतकृत्यः क्षीणकर्मा भिन्नहृद्ग्रन्थिसंशयः ।।५६।।**

निवात+दीपवत्+चित्तः ब्रह्म+आत्मा शून्य+वृत्तिकः कृत+कृत्यः क्षीण+कर्मा भिन्न+हृत्+ग्रन्थि+संशयः।५६।

**विक्षिप्तं शमयेत्** इतर विषयांच्या ओढीने चित्त चंचल झाले तर त्या विषयांचे चिंतन सोडून ते शांत करून परत ध्यानांत लावावे; **सकषायं जह्यात्** वासनांनी मलिन झाले तर त्या वासनांचा त्याग करावा. **समं वरम्** विक्षेप आणि कषाय यांनी रहित असेल तर उत्तमच! तेच ध्यानांत स्थिर करावे. **रसं न आस्वादयेत्** त्या ध्यानाच्या अवस्थेत जो आनंद स्फुरतो त्याच्या आस्वादांत रमू नये. त्याच्यापुढे जायचे आहे हे लक्षांत ठेवावे. अशा रीतीने साक्षात्कार होईपर्यंत ध्यान स्थिर करून (**प्रज्ञया निःसङ्गः भवेत्**) बुद्धीने निःसंग व्हावे.

अशा प्रकारे ध्यानाभ्यास करीत निवातीच्या दिव्यासारखे मन स्थिर करावे. हीच समाधी! पंचदशीत (१:५५) सांगितल्याप्रमाणे ध्याता आणि ध्यान ह्यांचा विसर पडून केवळ ध्येयाचेच भान राहून मन निवातीच्या दीपज्योतीप्रमाणे स्थिर होण्यालाच समाधी असे नांव आहे. श्रीमद्भवदगीतेतही (६:१९) *'यथा दीपो निवातस्थो नेऽङ्गते सोऽपमा स्मृता'* असेच समाधीचे वर्णन केलेले आहे. पतंजलींनी *'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्'* या सूत्रांतून (१:३) ह्याच अवस्थेचा निर्देश केला आहे. **ब्रह्मात्मा** म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदाच्या वचनानुसार (४:४:६) ब्रह्मरूप होऊन ब्रह्मांत मिळून जाणे. हाच अभ्यास पक्का झाला की वृत्तींचा पूर्ण लोप होतो (**शून्यवृत्तिकः**). अशा रीतीने आत्मज्ञानाने गीतावाक्याप्रमाणे (१५:२०) जीव कृतकृत्य होतो. असे हे तत्त्वाचे ज्ञान झाल्यानंतर आपण कांही कर्म केलेच नाही, करीत नाही व करणारही नाही असा अकर्त्या ब्रह्माशी एकरूपतेचा निर्धार झाल्यानंतर ब्रह्मसूत्राच्या प्रतिपादनानुसार (४:१:१३) झालेल्या वा होणाऱ्या कोणत्याच पापाचा लेशही त्याला स्पर्शत नाही. तसेच ब्रह्माच्या वस्तुसामर्थ्यामुळे औपनिषद सिद्धांताला (बृ.उ. ४:४:२२) आणि वेदांतसूत्रांना (४:१:१४) अनुसरून पुण्यही त्याला लागत नाही. ('नेदों लागों पापपुण्य अंगा'. संत तुकाराम). त्याच्या चित्तांतील सर्व गांठी मोकळ्या होतात आणि सर्व संशय फिटतात (मुंडक उ. २:२:८).

**प्रारब्धभोक्तात्मारामो जीवन्मुक्तो भवेद्ध्रुवम् । इत्युक्त्वोपररामेशः कार्तवीर्यस्तथाभजत् ।।५७।।**
**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तलीलाकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

प्रारब्ध+भोक्ता आत्म+आरामः ध्रुवं जीवन्+मुक्तः भवेत्। इति उक्त्वा ईशः उपरराम। कार्तवीर्यः तथा अभजत्।५७।

**'प्रारब्धभोक्ता'** या पदाने छांदोग्यांत सांगितल्याप्रमाणे (६:१४:२) ज्ञान झाल्यावर लगेच देह पडत नाही हे सूचित केले आहे. ब्रह्मसूत्रांत (४:१:१५) हेच प्रतिपादन आहे. अनारब्ध कर्मांचाच - म्हणजे संचिताचाच नाश होतो प्रारब्धाचा क्षय भोगूनच होतो. त्यामुळे शरीराचा पात होईपर्यंत प्रारब्धकर्म भोगावे लागतेच. भात्यांत असलेला बाण काढणे आणि त्याचे संधान करणे हे तीरंदाजाच्या मनावर असले तरी सोडलेला बाण कांही त्याला परत घेतां येत नाही. त्या बाणाचा वेग कमी झाल्यावरच तो जमिनीवर पडणार. तसेच ज्ञानी पुरुषाच्या प्रारब्धकर्माचे आहे. प्रारब्धानुसार आलेल्या भोगांना तो सादर होत असला तरी त्यांचे त्याला सुख वा दुःख कांहीच नसते हे स्पष्ट करण्यासाठी त्याला **आत्माराम** म्हटले आहे (मुंडक उ. ३:१:४). असा हा ज्ञानी निःसंशय (**ध्रुवं**) जिवंत असतांनाच मुक्त असतो (**'जीवन्मुक्तः'**) आणि देह पडल्यावर त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. देह हा कर्मफलाच्या भोगासाठीच उरलेला असल्याने त्याला ते भोगावेच लागतात; पण ज्ञानी पुरुषाला त्यांचे कांहीच सुख-दुःख नसते. ह्याचा उहापोह ब्रह्मसूत्रांत (४:१:१९) केलेला आहे. यापूर्वी पाहिल्याप्रमाणे प्रतिबंध नसला तर याच जन्मी ज्ञान होते (ब्र.सू. ३:४:५१) श्रुतीत (छां.उ. ८:४:१) आत्म्याला सेतू किंवा तीर म्हटले आहे, त्यावरून कुणी असा अर्थ काढतील की या ब्रह्माला पार करून आणखी कुठल्या तरी स्थानाला ज्ञानी जातो. तर ते तसे नाही. ब्रह्म कांही विशिष्ट बाबतीत सेतूसारखे आहे एवढाच त्याचा अर्थ आहे (ब्र.सू. ३:२:३१). बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:६) देहपातानंतर ज्ञानी पुरुषाच्या प्राणांचे उत्क्रमण होत नाही असे म्हटले आहे. ब्रह्मसूत्रातील निर्देशानुसार (४:२:१२) त्याचे प्राण देहांतच लय पावतात. तापलेल्या तव्यावर टाकलेल्या पाण्यासारखे ते ठायींच जिरून जातात. त्याच्या इंद्रियांचाही लय परमेश्वरांतच होतो. (ब्र.सू. ४:२:१५: प्रश्न उ. ६:५) ब्रह्मरंध्राचा भेद करून जाण्याचे वर्णन उपासकांच्या गतीचे आहे. त्यांना ब्रह्मदेवाबरोबर मुक्ति मिळते.

शुक्लगतीचीसुद्धां ज्ञान्यांना अपेक्षा नाही; कारण त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त दुसरे गन्तव्यच नाही. स्वर्गात जाणाऱ्या जीवांप्रमाणे त्यांना नवीन देह प्राप्त होत नाही. यासाठीच वर **ब्रह्मात्मा** असे म्हटले आहे. छांदोग्यांत (८:३:४) वर्णन केल्याप्रमाणे 'परम ज्योतिरूप प्राप्त करून तो त्या आपल्या मूळ रूपाने प्रकटतो'. ब्रह्मसूत्रानुसार (४:४:४) अपरोक्षानुभवाने प्राप्त होणारे मुक्त स्वरूप हे ब्रह्मापासून वेगळे नाही. म्हणजेच मुक्तीचा अर्थ आपलेच स्वयंसिद्ध आत्मस्वरूप आहे. स्वर्गादिकांप्रमाणे आगंतुक असे कांही नाही (ब्र.सू.३:४:५२). अशा या मुक्त पुरुषाला 'सर्वज्ञत्व, सत्यसंकल्पत्व इत्यादि गुणानी युक्त असा मी आहे' अशी जाणीवसुद्धां होत नाही; कारण ती होण्यासाठी कारणीभूत अविद्या मुळासकट नष्ट झालेली असते. म्हणूनच त्याला शून्यवृत्तिक म्हटले आहे. तो एकाच वेळी सविशेष आणि निर्विशेष ब्रह्माशी एकरूप झालेला असल्याने त्याला काळाचा भेद नाही (ब्र.सू. ४:४:५-७). अशा रीतीने दत्तप्रभूंनी उपदेशाचा समारोप केला आणि कार्तवीर्य अर्जुनाने त्यानुसार आचरण केले.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा चौथा अध्याय इथे पूर्ण झाला.**

**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पंचमोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पुराणोक्तावतारास्तु श्रुता यद्भवतोच्यते । तन्मे शुश्रूषवे व्यासाच्छंस त्वन्याश्च तत्कथाः ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**साधु पृष्टं त्वया वत्स शृणुष्वाऽवहितोऽमलाः । तत्कथा याः पुनन्त्यत्र श्रोतॄन्वक्तारमप्यघात् ।।२।।**

नामधारक उवाच। पुराण+उक्ताः अवताराः तु श्रुताः। यत् भवता उच्यते तत्, अन्याः च तत् कथाः, मे शुश्रूषवे शंस।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स, त्वया साधु पृष्टम्। अमलाः तत्+कथाः अवहितः शृणु, याः अत्र श्रोतॄन् वक्तारं अपि अघात् पुनन्ति।२।

**पंचमाध्यायी दत्तात्रेय ब्राह्मणीच्या भक्तीला। भुलून तियेचा श्रीपादनामा पुत्र झाला।।**
**हरुनि भावांचे अंधत्व तसे पंगुत्व निघाला। तीर्थटणा, लोकोद्धार करायला।।**

विवेक, वैराग्य, शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा आणि समाधान ही षट्संपत्ती आणि तीव्र मुमुक्षा ह्या चार साधनांनी संपन्न असलेला साधकाला गुरूंच्या उपदिष्ट महावाक्यांचे श्रवण, मनन, निदिध्यासन करून आत्मरूपाचा ऐक्यरूपाने साक्षात्कार होतो. परमार्थाला विमुख असलेल्यांना मात्र आपल्या अधिकारानुरूप कर्म, उपासना तसेच योग या साधनांनी प्रथम अंतःकरणाची शुद्धी आणि चित्ताची एकाग्रता संपादन करावी लागते. त्याने अर्थातच शमदमादि षट्संपदाही प्राप्त होतेच. विमुखांना कर्माचा उपदेश केला असला तरी गीतेत सांगितल्याप्रमाणे कर्माची गती गहन आहे. विहित कर्म, निषिद्ध कर्म (विकर्म) तसेच अकर्म (कर्म न करणे) हे सर्व नीट समजून घेतले पाहिजेत. ('कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं ह्यपि कर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहनो कर्मणा गतिः।।' भ.गीता ४:१७). हे कर्माचे तत्त्व ठाउक नसेल तर (विहित) कर्म करायला जावे तर तेच विकर्म होते आणि कधी कधी विकर्म केल्यानेच कर्म घडते. अशा प्रकारे विवेकाने भगवंताच्या प्रीतीसाठी म्हणून केलेल्या कर्मानेच सात्त्विक भक्ताला भगवंताचा कृपाप्रसाद लाभतो हे स्पष्ट करण्यासाठीच ह्या अध्यायाचा आरंभ केला आहे.

**धर्मं गोप्तुं सतस्त्रातुं दुष्टान्हन्तुं युगे युगे । लीलाधाम्नाऽवतरति नाऽन्यत्किञ्चित्प्रयोजनम् ।।३।।**
**दीनान्हीनमतीन्ज्ञात्वा दुर्बलान्नॄन्स कच्चरे । आविरासीत्समुद्धर्तुं प्रेम्णा भक्तिविधित्सया ।।४।।**

युगे युगे धर्मं गोप्तुं, सतः त्रातुं, दुष्टान् हन्तुं लीला+धाम्ना अवतरति। अन्यत् किञ्चित् प्रयोजनं न।३। कच्चरे नृन् दुर्बलान् दीनान् हीन+मतीन् ज्ञात्वा प्रेम्णा भक्ति+विधित्सया समुद्धर्तुं आविरासीत्।४।

पुराणांतरी वर्णन केलेले मत्स्य-कूर्मादि अवतार ऐकलेले आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या अंती आपण उल्लेखिलेले दोन अवतार ऐकण्यास मी उत्सुक आहे. तर ते अवतार व त्यांच्या इतर कथा विस्ताराने मला सांगाव्यात अशी प्रार्थना नामधारकाने केली आहे.१.

सिद्धमुनी म्हणाले, 'हे वत्सा तू हा प्रश्न फार चांगला विचारलास! त्या चित्ताचा मल घालवणाऱ्या आणि श्रोत्यांना तसेच वक्त्यालाही पापापासून शुद्ध करणाऱ्या त्या कथा आतां लक्ष देऊन ऐक.'२. आपल्या गीतेतील सुप्रसिद्ध प्रतिज्ञेनुसार (४:८) धर्माच्या रक्षणासाठी, साधूंच्या उद्धारासाठी आणि दुष्टांच्या निर्दलनासाठीच भगवंत लीलादेह धारण करून अवतरतात.

**परमेश्वर पक्षपाती आहे कां?** साधूंचा उद्धार करायचा आणि दुष्टांचा मात्र नाश करायचा याने परमेश्वरावर पक्षपात (**वैषम्य**) आणि दुष्टावा (**नैर्घृण्य**) यांचा आरोप करतां येत नाही. आई आपल्या बाळाचे कधी लाड करते तर आवश्यक तेव्हां त्याला मारतेसुद्धां. तसेच सर्वांच्या नियामक अशा परमेश्वराचेही आहे. लालन करतांना तसेच ताडन करतांनाही मातेच्या मनांत कारुण्यच असते तद्वतच जीवांना त्यांच्या पाप-पुण्यांचे फळ देण्यांत जीवांच्या अंतिम कल्याणाचेच विधान ईश्वर करत असतो. बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (३:२:१३) पुण्यवंत त्याने केलेल्या पुण्यकर्माने

**पीठापुरे पूर्वदेशे राजा नाम द्विजो वधूः । सुमतिस्तावुभौ नित्यं श्रीदत्तार्चनतत्परौ ।।५।।**

पूर्व+देशे पीठापुरे राजा नाम द्विजः, वधूः सुमतिः, तौ उभौ श्रीदत्त+अर्चन+तत्परौ।५।

होतो तर पापी त्याच्याच पापकर्माने तसा होतो. भगवद्गीतेत श्रीकृष्ण म्हणतात, जो ज्या प्रकारे मला भजतो त्यानुसारच मी त्याला भजतो (४:११). 'वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् तथा हि दर्शयति।' (२:१:३४) या ब्रह्मसूत्राचा हाच अभिप्राय आहे. त्याचे अन्य कांहीही प्रयोजन नाही कारण भगवंत पूर्णकाम आहेत.३.

मलदूषित कलियुगांतील (**कच्चरे**) मानव दरिद्री, मंदबुद्धी आणि ब्रह्मचर्यादि साधनांचे बल नसलेले आहेत हे जाणून त्यांच्या उद्धारासाठीच परम वात्सल्याने आपल्या विद्या आणि शक्तीसहित, परिपूर्ण ज्ञान-बल-वीर्य धारण करून, परमात्मा शुद्धसत्त्वगुणसंपन्न चिन्मय देहाने भक्तिमार्गाच्या स्थापनेसाठी अवतरला.४.

पूर्वेकडील (आंघ्रांतील) पीठापूर नांवाच्या गांवी आपळराजा नांवाचा ब्राह्मण होता. त्याची पत्नी सुमती नांवासारखी उत्तम बुद्धी असलेली होती. दोघेही पतिपत्नी दत्तभक्त असून ते नित्य दत्तप्रभूंच्या पूजेत रमलेले असत.५.

**एकदैत्यास्य वेश्मार्थि-वेषेणान्नं स्म याचते । दत्तः श्राद्धेऽकृतेप्यस्मै श्राद्धाहेऽन्नं ददौ सती ।।६।।**
**तदा ज्ञात्वा स तद्भावं सर्वात्मा भगवान्विभुः । प्रीतः स्वरूपं साध्व्यै तत्करं धृत्वा व्यदर्शयत् ।।७।।**
**स्रक्कुण्डीडमरूच्छूल-शङ्खचक्रधरोऽब्रवीत् । व्याघ्रचर्मावृतस्त्र्यास्यो जटिलो भस्मभूषितः ।।८।।**
**मातर्द्विजेष्वभुक्तेषु श्राद्धाहेऽन्नं त्वयार्पितम् । हव्यकव्यादबुद्ध्या मे तत्तुष्टोस्मि वरं वद ।।९।।**

एकदा अस्य वेश्मे अर्थि+वेषेण एत्य दत्तः अन्नं याचते स्म। श्राद्ध+अहे श्राद्धे अकृते अपि सती अस्मै अन्नं ददौ।६। तदा सःसर्व+आत्मा भगवान् विभुः तत्+भावं ज्ञात्वा प्रीतः साध्व्यै तत्+करं धृत्वा स्वरूपं व्यदर्शयत्।७। स्रक्+कुण्डी+डमरु+उत्+शूल+शङ्ख+चक्र+धरः व्याघ्र+चर्म+आवृतः त्रि+आस्यः जटिलः भस्म+भूषितः अब्रवीत्।८। '(हे) मातः श्राद्ध+अहे द्विजेषु अभुक्तेषु त्वया हव्य+कव्य+ अद+बुद्ध्या मे श्राद्ध+अन्नं अर्पितम्। तत् तुष्टः अस्मि। वरं वद।'९।

एकदा त्यांच्या घरी ब्राह्मण याचकाच्या रूपाने येऊन दत्तप्रभूंनी अन्नाची याचना केली. त्या दिवशी घरी श्राद्ध होते आणि ब्राह्मण जेवायचे होते. तरीही अतिथीला विन्मुख पाठवू नये असा विवेक करून सुमतीने भिक्षेकऱ्याच्या वेषांतील दत्तात्रेयांना अन्न दिले.६. तेव्हा सर्वांतर्यामी, सर्वव्यापी भगवंतांनी तिची ती भक्ती ओळखून अत्यंत प्रेमाने मातृभावाने त्या साध्वीचा हात धरून तिला आपल्या त्रैमूर्त्यात्मक रूपाचे दर्शन दिले.७. तीन मुखे आणि सहा हात असलेल्या प्रभूंनी खालच्या दोन हातांत माला-कमंडलु, मधल्या दोन हातांत डमरू-शूल आणि वरच्या दोन हातांत शंख-चक्र धारण केले होते. भस्माने भूषविलेल्या तनूवर व्याघ्रांबर लपेटले होते आणि मस्तकावर जटाभार रुळत होता. ते दत्तदेव त्या सतीला म्हणाले,(८) 'माई! श्राद्धाच्या दिवशी देवांच्या आणि पितरांच्या निमित्ताने निमंत्रित केलेल्या ब्राह्मणांचे भोजन होण्याआधीच हाच हव्य आणि कव्य यांचा भोक्ता विष्णू आहे (**हव्य+कव्य+अदः**) अशा बुद्धीने (भावाने) ते अन्न मला अर्पण केले त्याने मी संतुष्ट झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे! कितीही दुर्लभ मागणे असले तरी मी ते पुरवीन.'९.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**धन्यास्मि सर्वे पितरोऽपि धन्या यद्यो भवान्योगिमनोविदूरः ।**
**भूत्वाद्य मे दृग्विषयोऽपि पित्र्यं स्वाद्वाददेऽन्नं किमुताधिकं सत् ।।१०।।**
**सृष्ट्यादिहेतो जगतोऽसि भक्त-पुमर्थकल्पद्रुरतोऽर्पयाशु ।**
**मे सुप्रजस्त्वं जनसेवि मातरित्युक्तसम्बोधनसिद्धिपूर्वम् ।।११।।**
**एवं श्रुत्वात्रिवद्याच्ञां प्राह भूयात्तथैव ते । पुत्रस्ते भविता मादृक्तदुक्तिं मा तिरस्कुरु ।।१२।।**
**इत्युक्त्वाऽन्तर्दधे दत्तः सापि वेश्मैत्य हर्षिता । पत्ये शशंस तत्सर्वमुभावपि ननंदतुः ।।१३।।**

ब्राह्मणी उवाच। धन्या अस्मि। सर्वे पितराः अपि धन्याः यत् योगी+मनः+वि+दूरः भवान् मे दृक्+विषयः (अभूत्), (तथा) पित्र्यं स्वादु अन्नं अपि आददे। उत किं अधिक सत्?।१०। (हे) जगतः सृष्टि+आदि+हेतो! (हे) भक्त+पुं+अर्थ+कल्प+द्रुः जन+सेवि! 'मातः' इति उक्त+ संबोधन+सिद्धि+पूर्वं मे सु+प्रजस्त्वं आशु अर्पय।११। एवं अत्रिवत् याच्ञां श्रुत्वा प्राह, 'तथा एव ते मा+दृक् पुत्रः भविता। तत्+उक्तिं मा तिरस्कुरु'।१२। इति उक्त्वा दत्तः अन्तर्दधे। सा अपि हर्षिता वेश्मे एत्य तत् सर्वं पत्ये शशंस। उभौ अपि ननन्दतुः।१३।

त्या देवदुर्लभ दर्शनाने भारावून गेलेली ब्राह्मणी सद्गदित कंठाने बोलूं लागली. 'मी धन्य झाले! माझे सर्व पितर धन्य झाले!! योग्याच्या मनांपासूनही विशेषच दूर असणारे आपण आज माझ्या दृष्टीसमोर आलां. इतकेच नाही पितरांसाठी सिद्ध केलेले रुचकर अन्न ग्रहण केलेत! यापेक्षा अधिक सद्भाग्य ते काय?'१०. जगताची उत्पत्ती-स्थिती-संहार आपल्यापासूनच आहेत. भक्तांच्या पुरुषार्थासाठी आपण कल्पवृक्षाप्रमाणे आहांत. आपण 'आई' अशी जी हांक मारलीत तिला सत्यत्व येण्यासाठी (आपल्यासमान) सर्व लोकांना पूज्य अशा सुपुत्राचे मातृत्व मला शीघ्र द्या!११. अत्रिऋषींच्या मागण्यासारखीच ही तिची मागणी ऐकून दत्तप्रभू म्हणाले, 'तसेच होईल! तुला माझ्यासारखाच पुत्र होईल. मात्र त्याच्या वचनाचे तू कधीही उल्लंघन करूं नकोस!'१२. एवढे बोलून दत्तप्रभू अंतर्धान पावले. ती आनंदित झालेली सुमतीही घरांत आली आणि तिने यजमानांना सर्व हकीकत सांगितली. दोघेही हर्षनिर्भर झाले.१३.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**मयापराद्धमद्यान्नं दत्तं श्राद्धेऽकृतेप्यहो । दत्तात्रेयाय तन्नाथ क्षन्तुमर्हस्यशेषतः ॥१४॥**

॥ विप्र उवाच ॥

**पित्रर्थं भोजयित्वान्नैर्यैर्द्विजान्विष्णवेऽर्प्यते । कर्माभूत्स स्वयं तद्भुक्तत्कृतं सत्सुदुष्करम् ॥१५॥**
**रूपान्तरेण मध्याह्ने दत्तोऽटत्यर्थिवत्स्वकान् । उद्धर्तुं भगवांस्तस्मात्तदार्च्यो नान्यथाप्यते ॥१६॥**
**तस्माद्भद्रे कृतं भद्रं धन्ये नः पावितं कुलम् । वरोऽपि दुर्लभो लब्धो लोकस्यापि हितं यतः ॥१७॥**

ब्राह्मणि उवाच। 'अहो नाथ! अद्य श्राद्धे अकृते अपि दत्तात्रेयाय अन्नं दत्तम्। मया अपराद्धम्। तत् अशेषतः क्षन्तुं अर्हसि'।१४। विप्र उवाच। 'यैः अन्नैः पितृ+अर्थं द्विजान् भोजयित्वा (तत्) कर्म विष्णवे अर्प्यते, सः स्वयं तत्+भुक् अभूत्। सत्सु दुष्करं कृतम्।१५। दत्तः मध्याह्ने स्वकान् उद्धर्तुं रूपान्तरेण अर्थिवत् अटति। तस्मात् भगवान तदा अर्च्यः। अन्यथा (तथा) न आप्यते।१६। तस्मात् (हे) भद्रे, भद्रं कृतम्। नः कुलं पावितम्। वरः अपि दुर्लभः प्राप्तः। यतः लोकस्यापि हितम्'।१७।

सुमती म्हणाली, 'हे नाथ, श्राद्ध केलेले नसतांही श्राद्धीय अन्न दत्तात्रेयांना देऊन मी मोठाच अपराध केला आहे. आपण त्यासाठी क्षमा करावी!'१४. 'पितरांप्रीत्यर्थ केलेले जे चतुर्विध अन्न ब्राह्मणाना जेववून ते कर्म नंतर विष्णूलाच अर्पण करायचे असते. त्याच भगवान विष्णूंनी ते प्रत्यक्ष खाल्ले. हे अतिशय कठीण (किंवा मोठ्यांनाही कठीण) असे महान कर्म तू केलेले आहेस.१५. माध्याह्न काळी भगवान दत्तप्रभू याचकाच्या रूपाने भक्तांचा उद्धार करण्यासाठी फिरत असतात. त्या वेळी त्यांचे भिक्षा वाढून पूजन केले पाहिजे. अशा दुपारच्या वेळी केलेल्या अन्नदानाने त्यांची जशी कृपा प्राप्त होते तशी भजनपूजनादि अन्य साधनांनीही होत नाही. एवढ्यासाठी ही अन्नदानरूपी भगवत्सेवा अवश्यमेव करावी. माध्याह्नकाली आलेल्या अतिथीला अवश्य यथाशक्ती अन्न वाढावेच.१६. तेव्हां हे भाग्यवती, तूं हे पुण्याईचेच कार्य केले आहेस. आमचे कुल तू पावन केले आहेस. तसेच जो दुर्लभ वर तू मिळवला आहेस तो केवळ आपलेच नव्हे तर सर्व लोकांचेही हित करणारा आहे. तुझ्या निमित्ताने भगवान दत्तात्रेयांचाच अवतार भूतलावर होणार आहे!'१७.

**इत्युक्त्वा लौकिकं श्राद्धं शेषान्नेनाकरोद् द्विजः । साप्यथो गर्भिणी भूत्वा कालेऽसूतामुमप्यजम् ।।१८।।**
**मर्त्याकृतिं तदोद्वीक्ष्य तं दैवज्ञा जगुर्द्विज । ततपुण्यौघकल्पद्रु-फलं लब्धं सुदुर्लभम् ।।१९।।**
**अयं हि साक्षाद्भगवान्दत्तात्रेय इवार्चितः । अवतीर्णोऽत्र भक्त्यर्थमित्युक्त्वा ते मुदं ययुः ।।२०।।**

इति उक्त्वा द्विजः शेष+अन्नेन लौकिकं श्राद्धं अकरोत्। अथ सा अपि गर्भिणी भूत्वा काले, अजम् अपि अमुम्, असूत।१८। तदा मर्त्य+आकृतिं तं उद्वीक्ष्य दैवज्ञाः जगुः। (हे) द्विज, सुदुर्लभं ततः+पुण्य+ओघः+कल्प+द्रुः+फलं लब्धम्।१९। साक्षात् भगवान् दत्तात्रेय इव अर्चितः अयं (बालकः) हि अत्र (तव) भक्त्यर्थं अवतीर्णः (लक्ष्यते)। इति उक्त्वा ते मुदं ययुः।२०।

खरे तर श्राद्धासाठी केलेले अन्न साक्षात दत्तप्रभूंनाच समर्पण करून त्यांचीच प्रीती संपादन केल्यावर श्राद्ध सुसंपन्न झालेच होते. दत्तकृपेने ज्ञानी झालेल्या राजा आणि सुमती यांना हे कळतही होते. तरी पण ज्ञानी जसा आचरण करतो त्याचाच कित्ता इतर अज्ञानी लोक गिरवतात म्हणून गीतेच्या आदेशानुसार लोकसंग्रहासाठी त्या ब्राह्मणाने उरलेल्या अन्नाने ब्राह्मण जेववून श्राद्धाचा विधी पूर्ण केला. विष्णूला निवेदन केलेल्या अन्नाने अन्य देवतांची पूजा करूं नये असे स्मार्त मत असले तरी भागवत मताने आधी विष्णूला नैवेद्य दाखवून मगच अन्य देवतांना दाखवावे असाच विधी सांगितला आहे. पुढे त्या विप्रस्त्रीला गर्भ राहिला आणि यथाकाल दहाव्या महिन्यात जन्ममरणादि विकाररहित अशा ह्या वरद भगवंताला जन्म दिला.१८. मानवरूपधारी त्या प्रभूला पाहून - त्याचे जन्मकाळाचे ग्रहमान बघून, (आपळराजाने बोलावलेले) ज्योतिषी म्हणाले, 'विप्रवरा, खरोखर, तुझ्या पूर्वपुण्याईच्या वाढलेल्या कल्पवृक्षाचे अत्यंत दुर्लभ असे हे फळ तुला मिळाले आहे!१९. हा बाळ साक्षात् भगवान् दत्तात्रेयांसारखा पूज्य तुझ्या घरी तुझ्या भक्तीमुळेच अवतरला आहे असे आम्हाला वाटते.' असे बोलून बाळाच्या पत्रिकेतील शुभ आणि उच्चीचे ग्रह पाहून तेही आनंदित झाले.२०.

**श्रीपादः स्वङ्किताङ्घ्रित्वान्नाम्नोक्तः पितृलौल्यतः । स्वङ्गैर्ऋद्धिं पुपोषारं सौरांश्वाप्तेः शशीव सः ।।२१।।**
**संस्कृतेनोपनीतेन स्वयं त्रय्यपि पाठिता । स्वोद्वाहार्थं समुद्युक्तः पितानेन निवारितः ।।२२।।**

सु+अङ्कित+अङ्घ्रि+त्वात् श्रीपादः इति नाम्ना उक्तः। पितृ+लौल्यतः अरं सु+अङ्गैः सौर+अंशु+आप्तेः शशि इव ऋद्धिं पुपोष।२१।
संस्कृतेन (तथा) उपनीतेन अनेन स्वयं त्रयी पाठिता अपि। स्व+उद्वाह+अर्थं समुद्युक्तः पिता अनेन निवारिता।२२।

वज्र, अंकुश, ध्वज, पद्म इत्यादि शुभ चिह्नांनी शोभणाऱ्या पायांवरून त्याचे नांव श्रीपाद असे ठेवण्यांत आले. **श्री** या शब्दाचे शोभा, संपत्ती आणि पद्म असे अर्थ होतात. मातापित्यांच्या संगोपनाने लवकरच श्रीपाद सूर्यकिरणांनी व्यापलेल्या चंद्रासारखा सर्वांगांनी वाढू लागला. भारतीय परंपरेनुसार चंद्रमंडल हे जलमय आहे. त्या आकाशस्थ चंद्रावर पडलेले सूर्याचे किरण परावर्तित झाल्याने रात्रीचा अंधार नाहीसा होतो. एखाद्या अंधाऱ्या घरांत आरशावर पडलेल्या सूर्याच्या किरणांनी ते घर उजळून निघावे तसेच हे आहे. शुक्ल पक्षांत सूर्य आणि चंद्र यांच्यातील अंतर कमी होत जाते आणि सूर्याचे किरण वाढत्या प्रमाणांत चंद्रमंडलाला व्यापतात. त्यामुळे चंद्रबिंब जसे वाढत जाते तसा मातापित्यांच्या संगोपनाने श्रीपाद वाढूं लागला असा भावार्थ.२१. श्रीपादाचे जातकर्मापासून सर्व शास्त्रविहित संस्कार आपळराजाने केले आणि मुंजही केली. मुंज झाल्यावर खरे तर वेद आणि शास्त्रांचे अध्ययन करावयाचे असते. पण अवतारी श्रीपादाला त्या सर्वांचे स्वयंभूच ज्ञान असल्याने ऋक्, यजुः आणि साम या वेदत्रयीचे तसेच आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त या कर्मत्रयीचे त्यानेच इतरांना शिक्षण द्यायला आरंभ केला. यथाकाल श्रीपाद विवाहाला योग्य झालेला पाहून त्याच्या लग्नाच्या दृष्टीने राजा ब्राह्मणाने प्रयत्न आरंभिले. ते पाहून श्रीपादांनी मात्र त्यांना विरोध केला.२२.

**॥ श्रीपाद उवाच ॥**

**मया प्रव्रजतोद्वाह्या योगश्रीरेव नापरा । ममैव सुलभा सा तु यतः श्रीवल्लभोऽस्म्यहम् ॥२३॥**
**इत्युक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वोभौ साश्रुलोचनौ । ऊचतुस्त्वयि याते क्व जीवावोऽब्जा इवाम्बुनि ॥२४॥**

श्रीपाद उवाच। 'प्रव्रजतः मया योग+श्रीः एव उद्वाह्या, न अपरा। मम एव सा सुलभा, यतः श्री+वल्लभः अस्मि'।२३। इति उक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वा स+अश्रु+लोचनौ उभौ ऊचुः। 'त्वयि याते क्व जीवावः? अम्बुनि (याते) अब्जा (मत्स्याः) इव (मरिष्यावः)।२४।

**गृहस्थाश्रमाची आवश्यकता -** आपळराजांनी केलेले प्रयत्न हे श्रुती आणि स्मृतींच्या आज्ञाना अनुसरूनच होते. मनुस्मृतींत (३:२) ब्रह्मचर्याश्रमांत एक वा दोन वेदांचे अध्ययन करून गृहस्थाश्रम स्वीकारावा असे सांगितले आहे. तैत्तिरीय उपनिषदांतही (१:११:१) वेदाध्ययन झाल्यावर, 'आचार्यांना धनाने - गुरुदक्षिणेने प्रसन्न करून प्रजेचा तंतू तोडूं नकोस' म्हणजेच विवाह करून पुत्रलाभासठी प्रयत्न करण्याचाच उपदेश केला आहे. याचे कारण जन्माला येणारा प्रत्येक ब्राह्मण देव, ऋषी आणि पितर अशा तीन ऋणांसहच येतो (तैत्तिरीय संहिता ६:३:१०). स्वाध्याय (वेदाध्ययन) करून, अनुरूप स्त्रीशी विवाह करून आणि यज्ञयागादींचे अनुष्ठान करून, ऋतुकाली पत्नीशी समागम करून ऋणत्रयांपासून मुक्त व्हावे. क्वचित् पुत्रोत्पत्तीला कांही प्रतिबंध येत असेल तर पुत्रकामेष्टी करून त्या दिशेने प्रयत्न करण्याचीही शास्त्राची आज्ञा आहे. निपुत्रिकाला (स्वर्गादि) लोक मिळत नाहीत असेही सांगितले असतांना श्रीपादवल्लभांनी त्यांना प्रतिबंध कां केला या प्रश्नाचे उत्तर पुढील श्लोकांत देत आहेत.

**श्रीपादांची भूमिका -** अध्यात्मयोगाला साह्यभूत होणाऱ्या श्रेयरूपा - कल्याणकारी लक्ष्मीचा मला अंगीकार करायचा आहे म्हणून मी संन्यास घेतो आहे. कर्ममयी दुसरी जी प्रेयरूपा संपत् तिच्या अंगीकारानेही अंतःकरणशुद्धीद्वारा दैवी संपत् मिळेलच असे म्हटले तर त्यांत कर्माच्या बंधनात अडकण्याचा धोका आहे.

**त्वं साक्षाद्भगवान्विष्णुः पुत्रत्वेनाप्यतीन्द्रियः । प्राक्पुण्यैर्गोचरीभूतः कुतोऽकाब्धौ जहासि नौ ।।२५।।**

'त्वं साक्षात् भगवान् विष्णुः अति+इन्द्रियः अपि प्राक्+पुण्यैः पुत्रत्वेन गोचरीभूतः। नौ अक+अब्धौ कुतो जहासि?'।२५।

कठोपनिषदाच्या उपदेशानुसार (१:२:१) श्रेयाच्या अंगीकाराने कल्याण होते तर प्रेयाच्या अंगीकाराने अधोगती होते. किंवा असाही अर्थ करतां येईल कीं वेदांनी चित्तशुद्धीसाठी सांगितलेली ऋग्वेदादिरूपा अपरा श्री मला स्वीकारायची नाही कारण ते साधन मला आधीच प्राप्त झालेले आहे. त्यामुळे माझ्यासारख्या अधिकारसंपन्नालाच लाभणाऱ्या 'श्रेयोरूपा संपत्ती'चाच मी स्वीकार करणार आहे. त्यामुळेच माझे 'श्रियेचा वल्लभ' असे नांव आहे. ह्याचा भावार्थ असा आहे की कर्मकाण्डांतील विधी आणि निषेध प्रतिपादणाऱ्या श्रुती संसारांत आसक्त असणाऱ्या लोकांना उद्देशून सांगितल्या आहेत; आसक्तिरहित साधकांना नव्हेत. लैंगिक सुख, मांसाशन आणि मदिराप्राशन यांच्याकडे स्वाभाविक ओढ असणाऱ्यांना विशिष्ट प्रसंगी, विशिष्ट प्रकारेच त्यांचे सेवन करण्याची शास्त्राची केवळ अनुज्ञा आहे. याला परिसंख्या असे म्हणतात. यज्ञांतला हुतशेष म्हणूनच थोडे मांस किंवा सुरा घ्यायला किंवा स्वतःच्या पत्नीशीच, ऋतुकाळांतच समागम करण्याचे (आश्वलायन श्रौतसूत्र २:१६,२२-२७) विधान आहे. पराशर स्मृतीत (४:१३) ऋतुकाळांत पत्नीजवळ न जाण्याने भ्रूणहत्येचा दोष लागतो असे सांगितले आहे. हा दोष नावडती म्हणून किंवा द्वेषामुळे भार्येची उपेक्षा करणाऱ्यांसाठी आहे, विरक्ताला नाही हे ध्यानांत घेतले पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) ह्याच परमात्म्याचे ज्ञान प्राप्त करण्याच्या इच्छेने पूर्वीच्या ऋषिमुनींनी संन्यास घेतला. संततीची इच्छा सोडली. ते म्हणतात, संतती घेऊन आम्हाला काय करायचे आहे? त्यांच्यापासून न आम्हांला हा आत्मा प्राप्त होईल न हा लोक! पुत्रैषणा, वित्तैषणा आणि लोकैषणा ह्यांचा त्याग करून ते भिक्षेकरी झाले.२३. असे बोलून घर सोडून निघालेल्या त्या श्रीपादवल्लभाला पाहून त्याच्या आईवडिलांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. ते म्हणाले, 'तू आम्हांला सोडून गेल्यावर आम्ही कसे जगूं? पाण्याविना मासोळ्यांसारखे आम्ही मरून जाऊं.' (२४) आपण साक्षात् भगवान विष्णु आहांत. अतीन्द्रिय असूनही आमच्या पूर्वपुण्याईमुळे पुत्र या नात्याने आम्हांला दर्शन दिलेत. आतां आम्हांला असे शोकसागरांत टाकून कसे जातां?'२५.

**पङ्ग्वन्धार्भेक्षणान्नित्यं भवपाशविमोचनी । स्मृतिः प्रवयसोर्नौ ते हरे दूरतरा भवेत् ।।२६।।**
**इति वाक्यं सकारुण्यं श्रुत्वारं भ्रातृमस्तके । सुखाकरं निजकरं तद्वात्सल्याद्दधौ हरिः ।।२७।।**
**तदैव सहसा तौ तु स्वङ्गौ ज्ञौ च बभूवतुः । लीलाविहारिणीदन्नो चित्रं भगवतीश्वरे ।।२८।।**

(हे) हरे, नित्यं पङ्गु+अन्ध+अर्भ+ईक्षणात् प्रवयसोः नौ ते भवपाशविमोचनी स्मृतिः दूरतरा भवेत्।२६। इति सकारुण्यं वाक्यं श्रुत्वा तत्+वात्सल्यात् हरिः सुख+आकरं निजकरं अरं भ्रातृमस्तके दधौ।२७। तदा एव तौ सहसा सु+अङ्गौ ज्ञौ च बभूवतुः। लीलाविहारिणि भगवति ईश्वरे इदं न चित्रम्।२८।

'दुःख, दैन्य, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या हरी, (तूं गेल्यावर) सतत एक आंधळा आणि एक पांगळा अशा ह्या मुलांकडे पहाणाऱ्या आम्हांला वृद्धापकाळी मृत्युरूप संसारपाशांतून सोडवणारी तुझी स्मृतीसुद्धां आम्हांला दुरावेल.' वार्धक्य आणि मृत्यू ह्या दोन्ही कठीण प्रसंगी आम्ही तुझ्यावांचून निराधार होऊं असा भावार्थ.२६. यापुढील श्लोक सिद्धमुनी सांगत आहेत.

असे त्यांचे दीनवाणे वचन ऐकून त्यांच्यावरील प्रेमाने दुःखहारक श्रीपादांनी सुखाची जणूं खाणच असा आपला आनंदप्रेषक हात लगेच आपल्या बंधूंच्या मस्तकावर ठेवला.२७. श्रीपादांच्या हाताचा स्पर्श होतांच तत्काळ त्या दोघां भावांचे अपंगत्व एकदम नाहीसे झाले. आंधळ्याला उत्तम दृष्टी आली आणि पांगळ्याला छान चालतां येऊं लागले. एवढेच नाही तर ते ज्ञानसंपन्न झाले. लीलेने मनुष्यदेह धारण केलेल्या सर्वसमर्थ ईश्वराच्या संबंधांत ह्यांत कांहीच आश्चर्य (**चित्रं**) नाही.२८.

**माताप्यदृष्टपूर्वं तद्रूपमाश्चर्यवत्तदा । दृष्ट्वा दत्तोदितं स्मृत्वा प्राह गद्गदया गिरा ।।२९।।**
**माया दुरत्यया दैवी तव तन्मोहिता भृशम् । सत्वं रूपं न जानेऽतस्त्वयि मे पुत्रकल्पना ।।३०।।**

तदा माता अपि अदृष्टपूर्वं तत् रूपं आश्चर्यवत् दृष्ट्वा दत्त+उदितं स्मृत्वा (च) गद्गदया गिरा प्राह।२९। 'तव दैवी माया दुरत्यया। भृशं तत्+मोहिता (अहं तव) सत्त्वं रूपं न जाने। अतः त्वयि मे पुत्रकल्पना'।३०।

**आत्मदर्शन -** अशा रीतीने आपल्या वडील भावांना स्वस्थ केल्यावर श्रीपादांनी आपल्या आईला आपल्या स्वरूपाचे दर्शन दिले. ते पूर्वी न पाहिलेले स्वरूप पाहून ती स्तिमित झाली. खरे तर परमेश्वराची दोन स्वरूपे नाहीतच. पण हे सच्चिदानंदस्वरूप पूर्वी विक्षेप आणि आवरण ह्या मायेच्या दोन शक्तींच्या प्रभावाने, राहूने झांकलेल्या सूर्यासारखे, दिसले नव्हते - अनुभवाला आले नव्हते. ह्यांतून श्रीपादांनी आपल्या मातेला अपरोक्ष आत्मानुभूती दिली असे सूचित होते. गीतेत (२:२९) 'आश्चर्यवत् पश्यति' असेच आत्मदर्शनाचे वर्णन आहे. भ.पू. शंकराचार्यांनी हे आत्मदर्शन अदृष्टपूर्व असल्याने आश्चर्याला कारण होते असे टीकेत म्हटले आहे. त्याचाच इथे श्रीस्वामिमहाराजांनी अनुवाद केला आहे. कठोपनिषदातंही 'आश्चर्यो वक्ता' असे म्हटले आहे. सुमतीला आधी श्रीदत्तप्रभूंचे सगुण दर्शन झाले होते. हे त्यापेक्षां वेगळे निर्गुणसाक्षात्कारात्मक दर्शन झाले. ह्या अनुभवानंतर तिला त्या पूर्वीच्या दर्शनाच्या वेळी दत्तप्रभूंचे. 'तुला होणाऱ्या मुलाचे वचन मोडूं नकोस,' हे सांगणे आठवले आणि ती सद्गदित कंठाने म्हणाली.२९. 'तुझी अलौकिक अद्भुत माया खरीही म्हणतां येत नाही आणि खोटीही म्हणतां येत नाही ('सदसद्विलक्षण') अशी असल्याने दुस्तर आहे. त्यामुळे मी पार मोहून गेले! ('मुह्' या धातूचा अर्थ मनांत अवास्तव कल्पना उगवणे.) त्यामुळे तुझे वास्तव स्वरूप मला जाणतां आले नाही; आणि तू माझा मुलगा आहेस अशी विपरीत कल्पना माझ्या मनांत घर करून राहिली.'३०.

**ब्रह्माण्डलेखा यत्कुक्षौ स मत्कुक्षिज इत्यदः । जगद्विडम्बनं दत्त माया मां नावृणोतु ते ।।३१।।**

**।। श्रीपाद उवाच ।।**

**अदो रूपं त्वया दृष्टं नित्यं हृद्यवधारय । मायासिन्धुं द्रुतं तीर्त्वा मत्सायुज्यं गमिष्यसि ।।३२।।**
**शतायुषौ सुतौ तेऽपि पितृशुश्रूषणोत्सुकौ । विद्याश्रीपुत्रपौत्राढ्यौ मातर्मंक्षु भविष्यतः ।।३३।।**

यत् कुक्षौ ब्रह्मांडलेखा स मत्+कुक्षिजः इति अदः जगत् विडंबनं। (हे) दत्त! ते माया मां न आवृणोतु।३१। श्रीपाद उवाच। अदः त्वया दृष्टं रूपं नित्यं हृदि अवधारय। मायासिंधुं द्रुतं तीर्त्वा मत्+सायुज्यं गमिष्यसि।३२। (हे) मातः ते सुता अपि शतायुषौ, पितृशुश्रूषणोत्सुकौ, विद्या+श्री+पुत्र+पौत्र+आढ्यौ मंक्षु भविष्यतः।३३।

'ज्याच्या उदरांत अगणित ब्रह्मांडांच्या पंक्ती सहज सामावल्या आहेत तो माझ्या पोटीं जन्मला हे जगाला दाखवण्याचे केवळ नाटक आहे. हे दत्तप्रभो, तुझी माया माझ्या(बुद्धी)वर आवरण न टाको.'

**मायेची आवरणशक्ती -** मायेच्या दोन शक्ती आहेत. आवरणशक्ती आपल्या (आत्म)स्वरूपाला झांकून ठेवते, आणि विक्षेपशक्ती नसलेला, मिथ्या प्रपंच दाखविते. जन्ममरणादिरूप ह्या संसाराचे कारण मुख्यत्वे **असत्त्वावरण** आणि **अभानावरण** हेच आहेत असत्त्वावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्वच नाही अशी भावना. ही अध्यात्मशास्त्राच्या श्रवणमननाने दूर होते. अभानावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्व मनापासून पटले तरी तसा प्रत्यक्ष अनुभव न येणे. निदिध्यासनाने (ध्यानाने) हे जाऊन आत्मसाक्षात्कार होतो. विक्षेप म्हणजे देहादिकांच्या अध्यासाने खऱ्या वाटणाऱ्या जगतासंबंधीच्या कल्पना आणि विकार. हा विक्षेप संसाराचे कारण नाही. अंधुक प्रकाशांत दोरीवर भासणारा साप हे अज्ञान आहे. त्यांत दोरी न दिसणे हे अभानावरण आहे. ती दोरी तिथे नाहीच असे वाटणे हे असत्त्वावरण आहे.

**स्तुतोऽपि भ्रातरौ प्राह प्रव्रजाम्यधुना सदा । संसेव्यौ पितरौ तौ हि गृहिसत्पुत्रदैवतम् ।।३४।।**

**इत्युक्त्वा त्रिः परिक्रम्य प्रणम्य पितरौ स तु । जगाम तदनुज्ञातः काशीं च बदरीवनम् ।।३५।।**
**साधूनुद्धर्तुकामोऽथ गोकर्णं सज्जनाश्रयम् । ययौ यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम् ।।३६।।**

स्तुतःभ्रातरौ अपि प्राह, 'अधुना अहं प्रव्रजामि, पितरौ सदा संसेव्यौ। तौ हि गृहि+सत्+पुत्र+दैवतम्।'।३४। इति सः तु उक्त्वा पितरौ त्रिः परिक्रम्य तत्+अनुज्ञातः काशीं च बदरीवनं जगाम।३५। साधून् उद्धर्तु+कामः सत्+जन+आश्रयं गोकर्णं ययौ, यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्।३६।

## ।।इति श्रीगुरुचरिते श्रीपादावतारो नाम पञ्चमोध्यायः।।५।।

ह्या दोन्ही आवरणांमुळेच तिथे नसलेला साप दिसूं लागतो. तो पाहून निर्माण झालेले भय, शरीराला सुटलेला कांप इत्यादि विक्षेप होत. दिव्याच्या प्रकाशाने दोरी दिसणे हे ज्ञान होय. दोरी पाहिल्यावरसुद्धां छातीतली धडधड, शरीराचा कंप इत्यादि विक्षेप थोडा काळ राहतात. ते तसे राहिले तरी दोरीचे झालेले ज्ञान जात नाही आणि सापाचा भासही पुन्हा होत नाही. ते विक्षेप जावेत म्हणून वेगळे उपाय करण्याची आवश्यकता नाही. ते आपोआपच शमतात. ह्या अभिप्रायानेच सुमती फक्त मायेच्या आवरणापासूनच दूर ठेवण्याची प्रार्थना करीत आहे. श्रीस्वामिमहाराजांच्या 'सत्यज्ञानानंत' या अभंगांत हा अभिप्राय फार छान मांडलेला आहे. तो इथे उद्धृत करीत आहे.

**सत्यज्ञानानंत तुज वदे वेदांत । हें शोधितों होउनी दांत शांत समाहित ।।१।।**

**मालासर्पभ्रांत ध्वांती दीपें शांत । होय तेवीं हा वेदांत शमवी जीवभ्रांत ।।२।।**

**साप नोहे माळा स्पष्ट दिसली डोळां । घातली कंपे मिठी गळां न सुटे कांही वेळां ।।३।।**

**आवरणाची स्थिती न वसे विज्ञानांती । विक्षेपाची स्वरूपशांती होय प्रारब्धांतीं ।।४।।**

**जीव त्वन्मय होतां आवरणाची न वार्ता । स्वाधिष्ठानी तत्त्वें मिळतां विक्षेपान्त दत्ता ।।५।।**

**ऐसा वेदांतार्थ जाणुनी शोधूं स्वार्थ । मग तूं दत्ता भेटसी आम्हां इतर श्रम हा व्यर्थ ।।६।।**३१.

हे तूं पाहिलेले रूप सतत हृदयांत धारण कर म्हणजे तू हा मायासागर लवकरच पार करून माझे सायुज्य प्राप्त करशील. ह्या तुला अनुभवाला आलेल्या आत्मस्वरूपाचे तूं नित्य मनन आणि निदिध्यासन करून तें सत्त्वप्रधान हृदयांत स्थिर कर असा आदेश श्रीपादांनी दिला आहे. **दृष्टं** म्हणजे वृत्तिव्याप्तीने अनुभवलेले आत्मस्वरूप. वृत्तीव्याप्ती आणि फलव्याप्ती अशा दोन प्रकारांच्या ज्ञानांचा विचार आपण चौथ्या अध्यायांत (४:५५) केला आहे. आत्मानुभूती झाली तरी ती चित्तांत स्थिर होण्यासाठी अभ्यासाची आणि काळाची आवश्यकता आहे. एकदां केलेल्या उपदेशाने ज्ञान स्थिर झाले नाही तर त्याची उजळणी करावी ह्या ब्रह्मसूत्राचा (४:१:१) दाखला इथे श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. अशा रीतीने ज्ञानाचे प्रतिबंध (असंभावना, संशयभावना आणि विपरीतभावना) दूर होऊन माझ्या सच्चिदानंद स्वरूपाशी तूं एकरूप होशील.३२. तसेच हे माते, तुझे हे दोन्ही पुत्र शतायुषी होतील, आई-वडिलांची (तुमची) सेवा करण्यांत तत्पर असतील आणि विद्या, संपत्ती, पुत्र, पौत्र इत्यादीनी समृद्ध होतील.३३.

**दैवतें मायबाप -** श्रीपादांनी मातेला उपदेश केल्यावर त्यांच्या ज्येष्ठ बंधूंनीही त्यांचे स्तवन केले. त्यांना श्रीपाद म्हणाले, 'आज मी घर सोडून संन्यस्त जीवनाचा अंगीकार करीत आहे. तुम्ही दोघांनी यापुढे आईवडिलांची निरलस सेवा करावी. कारण गृहस्थाश्रमांत गुणी सुपूताची मुख्य दैवते मातापिताच आहेत. तशी वेदांची 'मातृदेवो भव. पितृदेवो भव' आज्ञाच आहे.' यांत मुख्यतः गृहस्थाश्रमाचाच उल्लेख एवढ्यासाठी आहे की ब्रह्मचारी गुरूंच्या अधीन असतो आणि संन्याशाने सर्व ममत्वाचा त्याग केलेला असतो.३४. वर **'पितरौ'** या शब्दाने आई आणि वडील असा दोघांचाही बोध होतो. आईवडिलांना तीन वेळां सव्य प्रदक्षिणा करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन श्रीपाद काशी आणि बदरिकाश्रमाला जायला निघाले.३५. काशी आणि बदरी यांची यात्रा करून श्रीपाद साधूंच्या उद्धाराच्या इच्छेने, सज्जनांना आश्रयभूत

अशा गोकर्णाला गेले, जिथे साक्षात् गणेशाने शैव लिंगाची स्थापना केली आहे.३६.

**समारोप -** श्राद्धाचा स्वयंपाक श्राद्धाच्या पूर्वीच इतरांना देणे हे तसे विकर्मच मानावे लागेल. पण भुकेला अतिथी घरी आलेला असेल तर त्याला अन्न नाही दिले तरीही ते विकर्मच होईल. *'स इद्भोजो यः'* इत्यादि मंत्रातून (ऋग्वेद १०:११७:३-४) अन्नदानाचे महत्त्व वर्णन केले आहे. अशा दुविधेत सांपडलेल्या सुमतीने दान न देण्यापेक्षां दान देणे बरें अशा भावात्मक निर्णय घेतला आणि *'अतिथिः सर्वरक्षकः'* या वचनाला अनुसरून हा अतिथी विष्णुस्वरूप आहे अशा ईश्वरबुद्धीने अतिथीला अन्न दिल्याने त्या सत्त्वगुणसंपन्न ब्राह्मणीला श्राद्धाच्या अनंतपट फळ लाभले. यावरून असे दिसते की सत्कर्माला प्रवृत्त होणारा बंधातून मुक्त होतो. अन्यथा कर्माची गती गहन आहे हेच खरे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा पांचवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## अथ षष्ठोऽध्यायः॥

**॥ नामधारक उवाच ॥**

**शैवं तत्र गणेशेन कुतो लिङ्गं प्रतिष्ठितम् । सज्जनाश्रयमेतत्तु कथं श्रावय मे मुने ॥१॥**

**॥ सिद्ध उवाच ॥**

**विष्णवाज्ञया गणेशेन रावणात्तं प्रतिष्ठितम् । शैवं लिङ्गं ततोऽत्रासन्देवाः संतोऽप्यदः शृणु ॥२॥**

नामधारक उवाच। तत्र गणेशेन शैवं लिङ्गं कुतः प्रतिष्ठितम्? एतत् तु सत्+जन+आश्रयं कथम्? (हे) मुने, मे श्रावय।१। सिद्ध उवाच। गणेशेन विष्णु+आज्ञया रावण+आत्तं शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्। ततः देवाः संताः अपि अत्र आसन्।२।

**रावणाला फसवून गणेशें केले लिंग स्थापन ।**
**सहाव्यांत चांडालीचा उद्धार आणि गोकर्णवर्णन ॥१॥**

कर्माचे तत्त्व जाणणाऱ्या सात्त्विक भक्तावर ईश्वराचा प्रसाद होतो हे पांचव्या अध्यायांत दाखविल्यावर कर्मतत्त्व न जाणणाऱ्या असात्त्विक (आसुरी) भक्तावर देवाची कृपा झाली तरीही ती विघ्नांच्या द्वारा कशी निष्फळ होते ते ह्या अध्यायांत सांगितले आहे.

मागील अध्यायाच्या शेवटी आपण त्या गोकर्ण क्षेत्रांत गणेशाने शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली असे म्हणालांत ते कसे काय? तसेच हे गोकर्ण साधु जनांचा आश्रय आहे ते कोणत्या प्रकारे?१. सिद्धांनी उत्तर दिले - भगवान विष्णूंच्या आज्ञेने रावणाकडून घेतलेल्या भगवान शंकरांच्या आत्मलिंगाची गणपतीने ह्या क्षेत्रांत प्रतिष्ठापना केली. तेव्हांपासून ब्रह्मदेवादि देव तसेच साधूसंत इथे राहू लागले.२.

**भजन्तीं मृन्मयं लिङ्गं कैलासाप्त्यै तु रावणः । प्रसूं निषिध्य सेशाद्रिं श्रीमानाहर्तुमाययौ ॥३॥**
**हठात्कैलासमुद्धर्तुमुत्कमोजस्विनं शिवः । लोकोत्पातभिया गौर्या स्तुतोऽगाधोऽवरोधयत् ॥४॥**
**सोऽपि मृत्यून्मुखीभूतो ध्यानतुष्टेन शम्भुना । समुद्धृतो दशमुखस्तत्तुष्ट्यै साध्वगायत ॥५॥**

कैलास+आप्त्यै मृत्+मयं लिङ्गं भजन्तीं प्रसूं निषिध्य श्रीमान् स+ईश+अद्रिं आहर्तुं आययौ।३। हठात् कैलासं उद्धर्तुं उत्कं ओजस्विनं लोक+अत्पात+भिया गौर्या शिवः स्तुतः अग+अधः अवरोधयत्।४। सः अपि मृत्यु+उन्मुखी+भूतः ध्यान+तुष्टेन शम्भुना समुद्धृतः। दश+मुखः तत्+तुष्ट्यै साधु अगायत्।५।

एकदा रावणाची आई मृत्तिकेचे लिंग करून त्याची शंकराप्रमाणे पूजा करत असलेली रावणाला दिसली. आपल्यासारखा ऐश्वर्यसंपन्न मुलगा असतांना आईने यःकश्चित् मातीच्या लिंगाची पूजा करावी हे त्याला सहन झाले नाही. तिला तसे न करण्याला सांगून तिच्यासाठी साक्षात् कैलास पर्वतच भगवान शंकरासह आणण्याच्या उद्देशाने तो तिथे गेला.३. कैलासाजवळ पोंचतांच महाबली रावणाने आपल्या आसुरी वृत्तीला अनुसरून अख्खा पर्वतच पायापासून उचलायला आरंभ केला. त्यामुळे कैलासावर भूकंपासारखे उत्पात होऊं लागले. तेथील सर्व लोक घाबरून शंकरांकडे आले. तेव्हां पार्वतीने ध्यानमग्न शंकरांची स्तुती केली आणि कैलासावर आलेले हे संकट निवारण्याची प्रार्थना केली. तेव्हां शंकरांनी तो पर्वत डाव्या हातानेंच दाबून धरला. त्या वेळी रावण त्याच्या खाली सांपडला.४. शंकरांनी डाव्या हाताने सहज दाबल्यानेसुद्धां तो दहा तोंडांचा रावण मरणोन्मुख झाला आणि ध्यान करून शंकरांकडे दयेची याचना करूं लागला. तेव्हां प्रसन्न झालेल्या सदाशिवांनी त्याला कैलासाखालून सुखरूप बाहेर काढले. मग तो रावण शंकरांना प्रसन्न करण्यासाठी सुमधुर गाऊं लागला.५.

**सुस्वरं साङ्गरागाढ्यं माधुर्यं स्वर्णमुत्तमम् । कालोचितं जगौ गीतं ततानद्धघनारयुक् ।।६।।**
**प्राणिमात्रमनोहारि दिव्यं गानं स शंकरः । प्रीतोऽब्रवीत्साधु गीतं रावणेष्टं वरं वृणु ।।७।।**

**।। रावण उवाच ।।**

**पूर्मेऽन्यदुर्लभा हैमी श्रीर्दासी दैवविद्विधिः । मृत्युर्दासोऽनुगा देवास्तन्मे न क्वापि दुर्लभम् ।।८।।**

सु+स्वरं स+अङ्ग+राग+आढ्यं माधुर्यं स्वर्णं उत्तमं काल+उचितं तत+आनद्ध+घन+आर+युक् गीतं जगौ।६। सः शंकरः प्रीतः अब्रवीत्। (हे) रावण प्राणि+मात्र+मनः+हारि दिव्यं गानं साधु गीतम्। इष्टं वरं वृणु।७। रावण उवाच। मे हैमी पूः अन्य+दुर्लभा, श्रीः मे दासी, विधिः दैव+वित्, मृत्युः दासः, देवाः अनुगाः। तत् मे क्व अपि दुर्लभं न।८।

बळाच्या जोरावर कैलास मिळणे शक्य नाही हे कळतांच रावणाने भगवान शंकरांची गानप्रियता लक्षांत घेऊन आपल्या संगीताने त्यांना प्रसन्न करण्याचा उद्यम आरंभिला. सप्तस्वरांच्या सुरेल रचनेने विविध रागरागिणींनी युक्त गोड गायन तो करूं लागला. तो उत्तम कवी असल्याने त्याने यमक-अनुप्रासादि शब्दालंकारांनी आणि अर्थालंकारांनी युक्त अशी गीते रचून तो गाऊं लागला. आपली दहा मुखे आणि वीस हात यांचा उपयोग करून त्याने वीणादि तंतुवाद्ये ('तत'), पखवाजादी चर्मवाद्ये ('आनद्ध'), झांजा, टाळ इत्यादि घन वाद्ये आणि बांसरी, सनई इत्यादि फुंकून वाजवायची ('आर') वाद्ये अशी चारही प्रकारची वाद्ये साथीला घेतली. आपल्या आंतडीचे तंतुवाद्य करून त्याने वाजविले असा इतरत्र उल्लेख आहे.६. मानव आणि देवच नव्हे तर सर्वच प्राण्यांच्या मनाला लुभवणारे ते गायन ऐकून ते आशुतोष शंकर भगवान प्रसन्न होऊऩ त्याला प्रेमाने म्हणाले, रावणा! हे तुझे अलौकिक गायन उत्तम झाले. तुला हवा तो वर मागून घे.७. रावण शंकरांना वर मागतांना आधी प्रौढी करतो आहे. 'माझी सोन्याची लंका शत्रूला अभेद्य आहे, साक्षात् लक्ष्मी माझी दासी आहे, ब्रह्मदेव माझा ज्योतिषी आहे, मृत्यू माझ्या आज्ञेवांचून कुणाचे प्राण घेऊं शकत नाही, सगळे देव माझे अनुचर आहेत. तेव्हां मला दुर्लभ असे या त्रैलोक्यांत काय आहे?'८.

**मात्राज्ञप्तोऽस्मि कैलासमानेतुं भो त्वयान्वितम् । देहि मे वरणीयार्थं भगवन्वरदोऽसि चेत् ।।९।।**

**।। शिव उवाच ।।**

**कैलासेन तु किं साध्यं प्राणलिङ्गं ततोऽधिकम् । गृहाणानेन मादृक्त्वं पूस्ते कैलासवद्भवेत् ।।१०।।**
**स्थाप्यते यत्र तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति । तस्मात्स्थापय पुर्येव धृत्वेदं कर्म मा कुरु ।।११।।**
**इत्युक्त्वा तत्करे लिङ्गं भक्त्याकृष्टमना ददौ । रावणोऽप्यतिसन्तुष्टो ययौ लङ्कां खलाग्रणीः ।।१२।।**

भो! मात्रा त्वया अन्वितं कैलासं आनेतुं आज्ञप्तः अस्मि। भगवन् वरदः असि चेत् वरणीय+अर्थं मे देहि।९। शिव उवाच। कैलासेन तु किं साध्यम्? ततः अधिकं प्राण+लिङ्गं गृहाण। अनेन त्वं मादृक्, ते पूः कैलासवत् भवेत्।१०। इदं यत्र स्थाप्यते तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति। तस्मात् पुरि एव स्थापय। इदं धृत्वा कर्म मा कुरु।११। भक्त्या+आकृष्ट+मना (शिवः) इति उक्त्वा तत्+करे लिंगं ददौ। खलाग्रणीः रावणः अपि अतिसंतुष्टः लङ्कां ययौ।१२।

आपल्याला स्वतःसाठी कांहीच मागायचे नाही अशी प्रस्तावना करीत रावण आपल्या आईचे नांव पुढे करीत आहे. मला मातेने आपल्यासहित कैलास आणण्याची आज्ञा केली आहे. आपल्याला वर द्यायचाच असला तर हाच वर (आपल्यासहित कैलास) द्या.९. तेव्हां भगवान शंकर त्याला म्हणाले, कैलास घेऊन काय मिळणार? त्यापेक्षां हे माझे प्राणलिंगच घे! त्याच्यामुळे तूं माझ्यासारखा होशील आणि तुझी लंकानगरीच कैलास होईल.१०. हे माझे आत्मलिंग तूं ज्या ठिकाणी ठेवशील तिथेच कायम स्थिर होईल. यासाठी तू ते आपल्या नगरीत पोचल्यावरच खाली ठेव. तसेच हे हातांत धरून कोणतेही कर्म करूं नकोस.११. भक्तीला भुललेल्या शंकरांनी असे बोलून ते आपले प्राणलिंग त्या रावणाच्या हातांत ठेवले. रावण म्हणजे लोकांना आक्रोश करायला लावणारा ('लोकान् रावयति') म्हणून त्याला दुष्टशिरोमणी म्हटले आहे. ते लिंग हातांत पडतांच त्याचा हर्ष गगनांत मावेना. त्याने तडक लंकेची वाट घरली.१२.

**ज्ञात्वैतन्नारदो योगी शशंस ब्रह्मणेऽपि सः । विष्णवे द्राक् त्रयोऽपीशं गत्वोचुः किं कृतं त्विदम् ।।१३।।**
**बद्धाः सर्वेऽमरा येन प्रसिद्धो लोककंटकः । राक्षसः प्राणिमात्राशी त्वत्समः स कथं कृतः ।।१४।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्याकृष्टं मनो मेऽद्य तेन गानादिना ततः । दत्तं लिङ्गं मया हर्षात्स नाद्यापि पुरं गतः ।।१५।।**
**व्याजेनैव खलो जय्य इत्युक्त्वा प्रेरयन्मुनिम् । विघ्नेशं च तदा विष्णुर्लिङ्गाहरण हेतवे ।।१६।।**

योगी नारदः एतत् ज्ञात्वा ब्रह्मणे शशंस। सः अपि विष्णवे (शशंस)। त्रयः अपि ईशं गत्वा ऊचुः इदं तु किं कृतम्?१३। येन सर्वे अमराः बद्धाः सः प्रसिद्धः लोककंटकः प्रणिमात्र+आशी राक्षसः त्वत्+समः कथं कृतः?१४। शिव उवाच। तेन गानादिना भक्त्या मे मनो अद्य आकृष्टम्। ततः मया हर्षात् लिंगं दत्तम्। (किंतु) सः अद्यापि पुरं न गतः।१५। तदा विष्णुः खलः व्याजेनैव जय्यः इति उक्त्वा मुनिं विघ्नेशं च लिंग+आहरण+हेतवे प्रेरयत्।१६।

योगाच्या परिपक्वतेने त्रिकालज्ञानी नारदांनी हे जाणले आणि मनोगतीने ही सर्व लिंगदानाची हकीकत जाणली. मनोवेगाने ब्रह्मलोकाला जाऊन आपल्या पिताजींच्या कानी घातली. ब्रह्मदेवसुद्धां नारदांना घेऊन तांतडीने वैकुंठाला गेले आणि त्यांनी विष्णूंना सर्व प्रकार कथन केला. मग ते तिघेही केवळ संकल्पानेच कैलास पर्वतावर शंकरांसमोर उपस्थित झाले आणि म्हणाले, रावणासारख्या दुष्टाला आत्मलिंगाचे दान आपण कसे बरे केले?१३. ज्याने सर्व देवांना बंदीखान्यांत टाकले आहे, जो तिन्ही लोकांना उपद्रव देणारा कांटा आहे असा सर्व प्राण्यांची संपत्ती आणि देहसुद्धां खातो असा राक्षस तुम्ही आपल्यासारखा कसा केला?१४. शंकर म्हणाले, 'त्याने गायनादि भक्तीने माझ्या मनाला भुरळ घातली. त्या आनंदांत मी त्याला आत्मलिंग दिले खरे! पण अजून तो लंकेला पोंचला नाही.' यांतून शंकर असे सुचवीत आहेत की तो लंकेला पोंचण्यापूर्वी माझ्या वरदानाला बाध न आणतां कांही उपाय तुम्ही करूं शकतां.१५. त्या वेळी विष्णूंनी विचार केला कीं ह्या दुष्टाला जिंकण्यासाठी साम-दाम-दंडादींचा उपयोग नाही. त्याला कपटानेच जिंकतां येईल. असे म्हणून त्यांनी नारदमुनीना रावणाला उशीर करायला, आणि विघ्नराज गणपतीला विघ्न करायला आणि रावणाकडून लिंग काढून घेण्यासाठी पाठविले.१६.

**नारदस्त्वञ्जसा योगी गत्वाग्रे रक्षसोऽब्रवीत् । आयातोऽसि कुतो ब्रूहि रावण द्राक् क्व गच्छसि ।।१७।।**
**रावणस्त्वब्रवीद् ब्रह्मन् तोषयित्वाद्य शंकरम् । लब्ध्वा लिङ्गं पुरं यास्ये पश्येदं शैवमुत्तमम् ।।१८।।**
**तत्प्रेक्ष्योचे मुनी रक्षः शृण्वेकः सैरभाशनः । मृगयायां हतो ब्रह्महरीशैर्दुर्धरो मृगः ।।१९।।**
**तैस्त्रीण्याप्तानि लिङ्गानि तच्छृङ्गेभ्यस्तदात्मवत् । मतान्यैशं त्विदं दैवाल्लब्धं सायुज्यदं विभोः ।।२०।।**
**सोऽप्याह नाद्य श्रोतव्यं गन्तव्यं सत्वरं मुने । क्वातीत्य संध्यां यासीति मुनिनोक्त उपाविशत् ।।२१।।**

योगी नारदः तु अञ्जसा रक्षसः अग्रे गत्वा अब्रवीत्। (हे) रावण कुतः आयातः असि? तथा द्राक् क्व गच्छसि? (मे) ब्रूहि।१७। रावणः तु अब्रवीत्। (हे) ब्रह्मन्! अद्य शंकरं तोषयित्वा लिंगं लब्ध्वा पुरं यास्ये। इदं उत्तमं शैवं (लिंगं) पश्य।१८। तत् (लिंगं) प्रेक्ष्य मुनी ऊचे। (हे) रक्षः शृणु। ब्रह्म+हरि+ईशैः मृगयायां एकः सैरभ+अशनः दुर्धरः मृगः हतः।१९। तैः तत्+शंगेभ्यः त्रीणि लिङ्गानि आप्तानि। (तानि तैः) आत्मवत् मतानि। इदं तु ऐशं विभोः सायुज्यदं दैवात् लब्धम्।२०। सः अपि आह, 'मुने न अद्य श्रोतव्यं, सत्वरं गन्तव्यम्।' ' संध्यां अतीत्य क्व यासि?' इति मुनिना उक्तः (सः) उपाविशत्।२१।

प्रथम नारदमुनी योगगतीने तात्काळ त्या राक्षसापुढे गेले आणि त्याला म्हणाले, 'अरे रावणा! तूं कुठून येतोयस? आणि एवढ्या घाईने कुठे चाललास? मला जरा सांग!'१७. रावण उत्तरला, 'मुनिवर्य! आज मी भगवान शंकरांना प्रसन्न करून त्यांचे आत्मलिंग मिळविले आहे. ते घेऊन मी माझ्या नगरीला जातो आहे. हे अत्युत्कृष्ट शैव लिंग पहा.'१८. ते लिंग पाहून नारदमुनी त्याला म्हणाले, 'हे राक्षसराजा, ह्याचा इतिहास ऐक. ब्रह्मा, विष्णू आणि शंकर ह्या तिघांनी शिकारीत एक रानरेड्यांचा आहार करणाऱ्या एक दुर्धर हिंस्र पशूची शिकार केली.१९. त्यानी त्या पशूच्या शिंगांपासून तीन लिंगे घेतली. ती आपल्यासमान मानून धारण केली. हे तर भगवान शंकरांचे लिंग आहे. हे तुला शिवसायुज्य प्राप्त करून देईल. तुला मोठ्या सद्भाग्याने हे मिळाले आहे.२०. तो (रावण) परत म्हणाला, 'मुनिराज, मला लवकर गेले पाहिजे. तुमची कथा ऐकायला मला आतां वेळ नाही.' 'अरे, संध्येची वेळ झाली आहे. संध्या सोडून कुठे चाललास?' असे नारदांनी त्याला टोंकल्यावर तो संध्येला बसला.२१.

**अत्रान्तरे गणेशोऽपि वर्णिलिङ्ग्यायर्यौ स तम् । करे कृत्वाऽब्रवीत्कोऽसि कस्य पुत्रः क्व गच्छसि ।।२२।।
सोऽप्याहोमाशंकरौ मे पितरौ देयमस्ति ते । किं ताभ्यां भो न चेत्पाणिं मोचयाशु बिभेम्यहम् ।।२३।।
रावणोऽप्याह नादेयं ताभ्यां लिङ्गं क्षणं वह । हैमीं मे गौरवाल्लङ्कां दर्शयामि सुखं वस ।।२४।।
बालेनैवोरु लिङ्गं नो धार्यतेऽपि न गम्यते । लङ्का घोरेत्यपि प्रोक्तः स तमाश्वास्य तद्ददौ ।।२५।।
दत्तलिङ्गोऽब्धितीरे स सांध्यां कर्तुं क्रियां ययौ । बालोऽप्याह त्रिराहूय नागते स्थापयामि कौ ।।२६।।**

अत्रान्तरे वर्णि+लिङ्गी गणेशः अपि आययौ। सः तं करे कृत्वा अब्रवीत्। 'कः असि?', 'कस्य पुत्रः?', 'क्व गच्छसि?'२२। सः अपि आह। 'उमा-शंकरौ मे पितरौ। ताभ्यां ते देयं अस्ति किम्? न चेत्, भोः आशु पाणिं मोचय। अहं बिभेमि।'२३। रावणः अपि आह, 'ताभ्यां न आदेयम्। क्षणं लिङ्गं वह। (ततः तुभ्यं) गौरवात् मे हैमीं लंकां दर्शयामि। (तत्र त्वं) सुखं वस।२४। 'बालेन एव(मया) ऊरु लिंगं नो धार्यते। घोरा लंका अपि न गम्यते। इति प्रोक्तः सः (रावणः) तम् आश्वास्य तत् (लिंगं) ददौ।२५। दत्तलिंगः सः सांध्यां क्रियां कर्तुं अब्धितीरे ययौ। बालः अपि आह, '(त्वां) त्रिः आहूय (त्वया) नागते लिंगं कौ (भुवि) स्थापयामि'।२६।

इतक्यांत ब्रह्मचारी वेषाने गणेशही तेथे आले. त्याने (रावणाने) त्याला प्रेमाने हाताला धरून विचारले, बाळा, तूं कोण? कुणाचा पुत्र आहेस? कुठे चाललास?२२. मुंज्याच्या वेषांतील गणपतीही त्याला म्हणाला, 'उमा माझी माता आहे आणि शंकर माझे पिता. ते तुझे कांही देणे लागतात कां? नसेल तर हे राक्षसा, लवकर माझा हात सोड. मला तुझी भीती वाटते!'२३. असे बोलणाऱ्या त्याला रावण त्याला म्हणाला, 'नाही रे! तुझ्या आईवडिलांकडून माझें कांही येणे नाही. हे माझे लिंग थोडा वेळ धर. तुला माझी सोन्याची लंका दाखवीन. तूं तिथे सुखाने राहा.'२४. 'मला पोराला हे जड लिंग धरवणार नाही; (तुझी) लंका भीषण वाटते' असे कुरकुरणाऱ्या गणेशाला कसेबसे समजावून ते लिंग (बळेच) त्याच्या हातांत दिले.२५. अशा रीतीने लिंग गणेशाच्या हातीं ठेवून तो रावण संध्याकर्म करण्यासाठी समुद्रकिनारी गेला. बालगणेशाने त्याला बजावले, 'तुम्हांला तीन वेळां हांका मारून तुम्ही आला नाही तर हे भारी लिंग मी जमिनीवर ठेवीन.'२६.

**इत्युक्त्वा किञ्चिद्विश्रम्य स्वः पश्यत्सु सुरेषु तम् । त्रिराहूय हरिं स्मृत्वा लिङ्गं सोऽस्थापयद्भुवि ।।२७।।**
**सोऽपेत्य स्थापितं दृष्ट्वा सन्ताड्यार्भं भुजैस्तु तत । उद्धर्तुमैच्छत्क्ष्मा तेन चकम्पेऽप्यचलं तु तत् ।।२८।।**
**महाबलेश्वर इति लिङ्गं तत्संज्ञितं ततः । गोकर्णवद्बलोद्धृत्या जातं तत्संज्ञितं स्थलम् ।।२९।।**
**कैलासोऽयं क्षितौ साक्षाद्यत्रेशः परिवारयुक् । सदा जागर्त्यतस्तत्र स्थिता देवर्षिसज्जनाः ।।३०।।**
**देवर्ष्यसुररक्षोनृ-तिर्यग्भिर्यत्र शंकरात् । लब्धोऽभीष्टो वरो नान्यदितः सत्पावनं स्थलम् ।।३१।।**

इति उक्त्वा सः किंचित् विश्रम्य स्वः सुरेषु पश्यत्सु तं (रावणं) त्रिः आहूय, हरिं स्मृत्वा लिंगं भुवि अस्थापयत्।२७। सः अपि एत्य (लिंगं) स्थापितं दृष्ट्वा अर्भं संताड्य भुजैः तत् (लिंगं) उद्धर्तुं ऐच्छत्। तेन क्ष्मा चकम्पे। तत् (लिंगं) तु अचलं (जातम्)।२८। तत् लिंगं महाबलेश्वर इति संज्ञितम्। ततः बल+उद्धृत्या गोकर्णवत् जातम्। तत् (गोकर्ण)संज्ञितं स्थलं (लिगं च जातम्)।२९। अयं क्षितौ साक्षात् कैलासः (अस्ति)। यत्र ईशः परिवारयुक् सदा जागर्ति। अतः तत्र देव+ऋषि+सज्जनाः स्थिताः।३०। यत्र देव+ऋषि+असुर+रक्षः+नृ+तिर्यग्भिः अभीष्टः वरः लब्धः। इतः अन्यत् सत्पावनं स्थलं न।३१।

एवढे बोलून गणेशाने थोडा वेळ वाट पाहून, (कौतुक पहायला जमलेल्या) स्वर्गस्थ देवांच्या साक्षीने त्याला (रावणाला) तीन वेळां बोलावून विष्णुस्मरणपूर्वक लिंग भूमीवर स्थापन केले.२७. त्या असुरानेही परत येऊन लिंग खाली ठेवलेले पाहून त्या मुलाला टोले देऊन आपल्या भुजांनी तें लिंग उचकटायचा प्रयत्न केला. त्याने भूमीसुद्धा कम्पित झाली; पण ते लिंग मात्र अचलच राहिले.२८. त्यावरून त्या लिंगाला महाबलेश्वर असे नांव पडले! तसेच जोराने उचकटल्याने ते गाईच्या कानाच्या आकाराचे झाले. त्यामुळे ते स्थळ आणि लिंग गोकर्ण या नांवाने ओळखले जाऊं लागले.२९. हा भूमीवर साक्षात् कैलासच आहे जिथे भगवान सदाशिव सपरिवार भक्तांच्या कामना पूर्ण करीत सदैव जागे असतात. म्हणजेच म्हणून तिथे देवता, ऋषी आणि साधुसंत यांचाही नित्य वास असतो.३०. जिथे देव, ऋषी, असुर, राक्षस, मानवच काय पण प्राण्यांनाही ईप्सित वराची प्राप्ती झाली आहे अशा या गोकर्णासमान शीघ्र पावन करणारे स्थान दुसरे नाही.३१.

**शृणु किञ्चिद्वसिष्ठेन शप्तोऽज्ञानकृतागसः । राक्षसत्वं द्वादशाब्दं प्राप मित्रसहो नृपः ।।३२।।**
**तदाहनद् द्विजं तत्स्त्रीः शापान्ते नृप पूर्ववत् । भूत्वाप्येष्यसि मच्छापाद्रतेऽन्तमिति तं जगौ ।।३३।।**

शृणु किञ्चित्। अज्ञानकृत+आगसः मित्रसहः नृपः वसिष्ठेन शप्तः द्वादश+अब्दं राक्षसत्वं प्राप।३२। तदा द्विजं अहनत्। तत्+स्त्रीः तं जगौ, 'हे नृप! शापान्ते पूर्ववत् भूत्वा अपि मत्+शापात् रते (तव) अंतम्।'इति।३३।

सिद्ध मुनि नामधारकाला सांगत आहेत, 'जरा ऐक! इथे पुराणातील एका कथेचा संदर्भ आहे. एकदां मित्रसह नांवाच्या इक्ष्वाकु वंशांतील राजाने अरण्यातील एका राक्षसाचा वध केला. त्या राक्षसाच्या भावाने कपटाने राजाचा सेवक होऊन त्याची मर्जी संपादन केली आणि सूडासाठी योग्य संधीची वाट पाहू लागला. एकदां आपल्या घरी आलेल्या वसिष्ठांना भोजनाचे आमंत्रण देऊन राजा कांही कार्यांत व्यस्त झाला असतां तिथे राक्षसाने वसिष्ठांचे रूप धरून जेवणासाठी मृगमांसाची मागणी केली. राजाने त्याप्रमाणे व्यवस्था केली. जेवायला वाढतांना त्या कपटवेषांतील राक्षसाने मृगमांसाऐवजी नरमांसच आणून वाढले. वसिष्ठ मुनींनी रागावून राजाला शाप दिला. 'आपण मागणी केल्यानुसार सर्व पाक केला असतांना हा उगीचच मला शाप दिलात. आतां मीसुद्धां आपणांस शाप देतो,' असे म्हणून राजानेही हातांत पाणी घेतले. एवढ्यांत त्याची राणी मध्ये पडली आणि राजाला प्रार्थनेने गुरुशापाच्या दुष्कर्मापासून परावृत्त केले. वसिष्ठांनाही ध्यानाद्वारे झालेला सर्व प्रकार लक्षांत आला. तेव्हा ते म्हणाले, माझा शब्द खरा होणारच; पण शापानुसार तू बारा वर्षे ब्रह्मराक्षस होऊन परत राजा होशील. तेव्हां राजाने हातांतले शापजल खाली सोडून दिले ते त्याच्या पायांवर पडले. त्यायोगें तो कल्माषपाद नांवाचा ब्रह्मराक्षस झाला.३२. त्या राक्षसावस्थेत असतांना राजाने अरण्यातील वाटेने जाणाऱ्या ब्राह्मण दंपतीपैकी पतीला, त्याची पत्नी सारखी काकुळतीने परावृत्त करीत असातांनाही, मारून खाऊन टाकले. त्या वेळी आपल्या पतीच्या अस्थी सांवडतांना ती ब्राह्मणी म्हणाली, 'अरे राजा! शापाचा काळ संपल्यावर जेव्हा तू पुनश्च राजा होशील तेव्हां स्त्रीशी समागम करतांच तुझा अंत होईल!'३३.

**अथैष पूर्ववद्भूत्वा स्वं राज्यं प्राप्य दुःखितः । स्मरातुरायै महिष्यै साध्वीशापं शशंस राट् ।।३४।।**
**ततः खिन्नावुभौ तीर्थ-यात्रासक्तौ यदृच्छया । आयान्तं गौतमं दृष्ट्वा सर्वं तस्मै शशंसतुः ।।३५।।**
**गौतमोऽप्याह भो मा भीर्गोकर्णेऽघौघहारिणि । कामिकल्पद्रुमे क्षेत्रे किं भवेद्ब्रह्महत्यया ।।३६।।**
**तीर्थानि सर्व तोयानि शैवलिङ्गानि ताः शिलाः । लिङ्गतीर्थमये तत्र दिव्ये किं दुर्लभं नृणाम् ।।३७।।**

अथ एष पूर्ववत् भूत्वा राज्यं प्राप्य दुःखितः कामातुरायै महिष्यै राट् साध्वी शापं कथयामास।३४। ततः उभौ खिन्नौ तीर्थ+यात्रा+सक्तौ यदृच्छया गौतमं आगतं दृष्ट्वा तस्मै सर्वं शशंसतुः।३५। गौतमः अपि आह, भो (राजन्), मा भीः। अघ+ओघ+हारिणि कामि+कल्पद्रुमे गोकर्णे क्षेत्रे (विद्यमाने) ब्रह्महत्यया किं भवेत्?३६। तत्र सर्व तोयानि तीर्थानि, ताः शिलाः शैवलिङ्गानि। तत्र लिङ्ग+तीर्थमये (क्षेत्रे) नृणां किं दुर्लभम्?३७।

बारा वर्षांनी राक्षसत्वाचा परिहार झाल्यावर तो पूर्वीप्रमाणे राज्यकारभार पाहूं लागला. पण ब्रह्महत्येचे पाप आणि त्या ब्राह्मणीचा शाप यांमुळे तो दुखीकष्टी असायचा. एकदां त्याची राणी कामातुर होऊन त्याच्याकडे आली असतांना तिला राजाने आपल्याला झालेला साध्वीचा शाप निवेदन केला.३४. तेव्हां दोघेही दुःखीकष्टी झाले आणि ब्रह्महत्येच्या परिमार्जनासाठी तीर्थयात्रेला निघाले. त्यावेळी स्वेच्छेने भूमीपर्यटण करणारे गौतम ऋषी त्यांना दिसले. त्यांचा यथोचित सत्कार करून त्या पतिपत्नींनी त्याना आपले दुःख निवेदन केले.३५. गौतमांनी राजाला धीर दिला. म्हणाले, 'अरे राजा! गोकर्णासारखे पापांचे पुंज नष्ट करणारे आणि सकाम लोकांना कल्पवृक्षासारखे इष्ट देणारे क्षेत्र या भूतलावर असतांना ब्रह्महत्येचे काय भय धरतोस?३६. तिथे सर्वच जलाशय आणि जलप्रवाह तीर्थस्वरूप आहेत. महापापीसुद्धां ज्यांच्यायोगे तरून जातो ('तीर्यते अनेन') त्याला तीर्थ म्हणतात. तसेच तेथील सर्वच दगड-धोंडे ही अर्चनीय अशी शिवलिंगेच आहेत. अशा तीर्थ आणि लिंगांनी संपन्न असलेल्या त्या गोकर्ण क्षेत्रांत मानवांना दुर्लभ असे काय आहे?' सर्व कांही सुलभच आहे. तीर्थांच्या दर्शन, स्पर्शन, स्नान, पान इत्यादींनी अंतःकरणाची शुद्धी होते. तसेच शिवलंगांच्या पूजेने आणि वंदनाने शंभुप्रसादाने चित्ताची एकाग्रता लाभते. अशा प्रकारे मोक्षसुद्धा सुलभच आहे, हेच इथे सुचविले आहे.३७.

**शृणु तत्र मया दृष्टा चण्डाल्येका मृता तु ताम् । शिवदूता विमानेन कैलासं नेतुमागताः ।।३८।।**
**मया पृष्टास्तु ते प्रोचुः प्राग्वृत्तं शृणु गौतम । प्राग्भवे विप्रकन्येयं बाल्येऽभूद्विधवा विधेः ।।३९।।**
**तन्वी कामपरा नित्यं युवसौन्दर्यमोहिता । वृत्वा कान्तं विशं भेजे सौपपत्यं रहोऽपि तत् ।।४०।।**
**जातं लोकप्रसिद्धं हि मलो नाच्छाद्यतेऽपि कैः । सम्बन्धिनस्तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं तदाऽभजन् ।।४१।।**
**ततो रेमेऽपशङ्कं सा पानासक्ता मदोद्धता । विशः कुटुम्बिनी भूत्वा कन्दर्पहतचेतना ।।४२।।**

शृणु। तत्र मया एका चण्डाली मृता दृष्टा। शिव+दूताः तां विमानेन कैलासं नेतुमागताः।३८। मया पृष्टाः तु ते प्रोचुः। (हे) गौतम, प्राक् वृत्तं शृणु। इयं प्राक् भवे विप्रकन्या। विधेः बाल्ये विधवा अभूत्।३९। सा तन्वी नित्यं कामपरा युव सौंदर्य मोहिता विशं कान्तं वृत्वा रहः औपपत्यं भेजे। तत्..।४०। (तत्) लोकप्रसिद्धं जातम्। मलः कैः अपि न आच्छादते। तदा सम्बन्धिनः तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं अभजन्।४१। ततो सा कन्दर्पहतचेतना विशः कुटुम्बिनी भूत्वा पानासक्ता मदोद्धता अपशङ्कं रेमे।४२।

'राजा मी प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत सांगतो ती ऐक. मी तिथे (गोकर्ण क्षेत्रांत) एक चांडाळीण मरतांना पाहिली. तर काय आश्चर्य, तिला कैलासावर नेण्यासाठी शिवदूत विमान घेऊन आले.'३८. मी त्यांना विचारल्यावर ते मला म्हणाले, 'अहो गौतम ऋषी, हिचा पूर्वीचा वृत्तांत ऐका. मागील जन्मी ही ब्राह्मणकन्या होती. दैवगतीने ती बालपणीच विधवा झाली.३९. ती रूपवती आणि सतत कामचिंतनाने तरुणांच्या सौंदर्याने मोहित होत असे. एकदां तिने एका गोऱ्यागोमट्या वैश्य तरुणासह व्यभिचाराने संबंध ठेवला. चोरून केले तरी ते दुष्कृत्य.४०. लोकांत प्रकट झालेच. पाप कुणाला (**कैः**) झांकून ठेवतां येत नाही. **कैः** म्हणजे पाण्याने मल (विष्टा) झांकतां येत नाही असाही अर्थ लावतां येईल. तेव्हा तिच्या नातेवाइकांनी तिला घराबाहेर काढून संसर्गदोषाच्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त घेतले.४१. मग तर कामविकाराने विवेकशून्य होऊन मद्याच्या आहारी जाऊन त्याच धुंदींत ती वैश्यासह राजरोस संसार करूं लागली.४२.

**प्रमत्ता सैकदा वत्सं मेषभ्रान्त्या निहत्य कम् । स्थापयित्वाऽत्तुमन्येद्युः शेषं पक्त्वा चखाद ह ।।४३।।**
**ज्ञात्वाऽथ गोशिरो जार-भीत्या निक्षिप्य तद्भुवि । व्याघ्रेणापहृतो वत्सः शिवेत्थं पर्यदेवयत् ।।४४।।**
**इत्याद्यवाच्यपापानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समम् । दारुणां दुर्गतिं भुक्त्वा जातेदृश्यघशेषतः ।।४५।।**
**जन्मतोऽस्या गलत्कुष्ठ आन्ध्ये सत्यपि रक्षिता । पितृभ्यां तावपि मृतौ ततोऽनाथा रुरोद सा ।।४६।।**
**संगत्य यात्रिकैः सत्रा माघे दैवादिहागता । क्षुधिता शिवरात्रौ सा ययाचेऽन्नं सुदुःखिता ।।४७।।**

एकदा सा प्रमत्ता मेष+भ्रांत्या वत्सं निहत्य कं अन्ये द्युः अत्तुं स्थापयित्वा शेषं पक्त्वा चखाद ह।४३। अथ गोशिरो ज्ञात्वा तत् जार+भीत्या भुवि निक्षिप्य 'शिव (शिव), वत्सः व्याघ्रेण अपहृतः' इत्थं पर्यदेवयत्।४४। (सा) इत्यादि अवाच्य पापानि कृत्यानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समं दारुणां दुर्गतिं भुक्त्वा अघशेषतः ईदृशी जाता।४५। अस्या जन्मतः गलत्कुष्ठम्। आन्ध्ये सति अपि (सा) पितृभ्यां रक्षिता। तौ अपि मृतौ। ततः अनाथा सा रुरोद।४६। दैवात् सा माघे यात्रिकैः सत्रा इह आगता। सा क्षुधिता सुदुःखिता शिवरात्रौ अन्नं ययाचे।४७।

एकदां दारू पिऊन तर्र असतांना तिने बकरा समजून गाईचे वांसरूंच कापले आणि डोके दुसऱ्या दिवशी खायला शिंक्यावर ठेवून बाकीचे शिजवून खाऊन टाकले.४३. सकाळी ते वांसराचे डोके पाहून, ते तिने जाराच्या भीतीने जमिनीत गाडून टाकले आणि 'देवा, देवा! वासरूं वाघाने धरून नेले हो!' असे म्हणून खोटेच रडूं लागली.४४. अशी जिभेवर आणण्यासही अनुचित अनेक दुष्कृत्ये करून मेल्यावर आपल्या संबंधितांसह दारुण नरकांत पिचून पापाचा भोग झाल्यावर उर्वरित पापामुळे ती ही अशी चांडाळाच्या घरी जन्म पावली.४५. हिला जारकर्माच्या फलस्वरूप हिचे शरीर जन्मतःच कुष्ठग्रस्त होते. तसेच गाईचे वांसरूं मारल्याने ती आंधळी होती. अशा अवस्थेत आईवडील होते तोंपर्यंत त्यांनी तिचा सांभाळ केला. त्यांच्या मृत्यूनंतर ती लाचार होऊन दुःखाकष्टांत कशीबशी जगूं लागली.४६. दैवयोगाने ती यात्रेकरूंच्या बरोबर माघ महिन्यात इथे (गोकर्ण क्षेत्रांत) आली. शिवरात्रीच्या दिवशी भुकेने कासावीस होऊन ती येणाऱ्याजाणाऱ्यांकडे खायला मागूं लागली.४७.

**जनैस्तदाशनाभावात्प्रसारितकरेऽर्पितम् । बिल्वमाघ्राय तत्याज मत्वाऽभक्ष्यं सुदुःखिता ।।४८।।**
**लिङ्गे त्यक्तं तु तत्पूजा श्रुतमह्नीशकीर्तनम् । उपवासोऽशनाभावाद् दुःखाज्जागरणं निशि ।।४९।।**
**एवं साङ्गं व्रतं चीर्णं तेन भूत्वा सुनिर्मला । मृताऽद्यात्र शिवाज्ञप्ताः स्म आनेतुमिमां द्रुतम् ।।५०।।**
**तैरित्युक्त्वाऽमृतं सिक्त्वा विमानाग्रे निधाय ताम् । जग्मुः कैलासं सहोत्थ-क्रियागतिरियं त्विह ।।५१।।**

तदा अशन+अभावात् (तस्याः) प्रसारित+करे अर्पितम् बिल्वं आघ्राय सा सुदुःखिता अभक्ष्यं मत्वा तत्याज।४८। लिङ्गे त्यक्तं तत् तु पूजा जाता। अह्नि ईश+कीर्तनम् श्रुतम्। अशन+अभावात् उपवासो (जातः)। निशि दुःखात् जागरणं (जातम्)।४९। एवं व्रतं सांगं चीर्णम्। तेन (सा) सुनिर्मला भूत्वा अद्य अत्र मृता। (वयं) इमां (कैलासं) आनेतुं शिव+आज्ञप्ताः स्म।५०। तैः इति उक्त्वा अमृतं सिक्त्वा तां विमान+अग्रे निधाय कैलासं जग्मुः। इयं तु इह सह+उत्थ+क्रिया+गतिः।५१।

तेव्हां (सगळ्यांना उपवास असल्याने) खाद्य वस्तूंच्या अभावी तिच्या पुढे केलेल्या हातावर कुणी तरी बेलाचे पानच टाकले. तिने ते हुंगून पाहतां खाण्यायोग्य नाही असे जाणून चरफडत टाकून दिले.४८. ते लिंगावर जाऊन पडले. तीच पूजा झाली! दिवसभर देवाचे भजन कांनांवर पडले. खायला कांहीच न मिळाल्याने उपास घडला. रात्रभर दुखाने तळमळत झोंप कसली येणार?४९. 'असे तिच्याकडून हे शिवरात्रीचे व्रत, शिवार्चन, उपोषण, जागरण, कीर्तन या सर्व अंगासहित, यथासांग पार पडल्याने तिच्या पापांचे क्षालन होऊन ती अतीव शुद्ध झाली आणि आजच्या ह्या पवित्र दिवशी या पावन क्षेत्री हिला मृत्यू आला. त्यामुळे भगवान महादेवांनी आम्हांला हिला कैलासावर घेऊन येण्याची आज्ञा केली आहे.'५०. त्यांनी असे सांगून तिच्यावर अमृत शिंपून तिला विमानांत पुढे बसविले आणि कैलासाला निघून गेले. असे बोलून गौतम राजाला म्हणाले, 'ही ह्या भूलोकांत सहज घडलेल्या कर्माने प्राप्त होणारी सामान्य गती आहे.५१.

**विदुषस्तु फलाधिक्यं ज्ञात्वेदं गच्छ मुच्यसे । तच्छ्रुत्वा द्राङ् नृपो गत्वा क्षणान्मुक्तो बभूव ह ।।५२।।**
**गोकर्णमीदृशं क्षेत्रं सत्तमं सज्जनाश्रयम् । अतस्तत्रैव तस्थौ हि श्रीपादः साधुजीवनः ।।५३।।**
**मोचयित्वा सतोऽब्दांस्त्रींस्तत्रोषित्वा गतागतात् । कृष्णातटे कुरुपुरं प्राप्यादृश्योऽभवत्स तु ।।५४।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे गोकर्णवर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ।।६।।**

विदुषस्तु फलाधिक्यं इदं ज्ञात्वा गच्छ। तत् श्रुत्वा नृपः (गोकर्णं) द्राक् गत्वा क्षणान् मुक्तो बभूव ह।५२। ईदृशं सत्तमं सज्जन+आश्रयं गोकर्णं क्षेत्रम् (अस्ति)। अतः साधु+जीवनः हि श्रीपादः तत्र एव तस्थौ।५३। सतः गतागतात् मोचयित्वा तत्र त्रीन् अब्दान् उषित्वा कृष्णातटे सः कुरुपुरे प्राप्य तु अदृश्यो अभवत्।५४।

'जाणून कर्म केलेल्या कर्माचे फळ यापेक्षां अधिकच आहे हे समजून, हे राजा तूं गोकर्णाला जा.' ज्ञानी पुरुषाला कर्माचे अधिक फळ मिळते याचा अर्थ ते मोक्षपर्यवसायी होते. यावर कुणी असा निष्कर्ष काढला की ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने मोक्ष मिळतो तर ते बरोबर नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:१६) *'कर्मणा पितृलोको विद्यया देवलोक'* असे ज्ञानयोग आणि कर्मयोगाचे भिन्न फळ सांगितले आहे. त्यामुळे एकच साधक त्या दोन्हींचे एकाच वेळी अनुष्ठान करूं शकत नाही. कर्मयोगाने ज्ञानाचा अधिकार प्राप्त करून घेऊन मग कर्मसंन्यास केल्यावरच ज्ञानयोगाची साधना शक्य आहे. ह्या ठिकाणी ज्ञान म्हणजे क्रियेसंबंधाचे ज्ञान असाच घ्यावा लागेल. अशाच ज्ञानाने कर्माचे अनुष्ठान शक्य आहे. *'विद्यां चाविद्यां च'* इत्यादि श्रुतींत (ईशावास्योपनिषत् ११) विद्येने अमृतत्वाची प्राप्ती प्रतिपादलेली आहे. हे अमृतत्व सापेक्ष आहे. जिथे मृत्यू नाही अशा देवत्वाला (*अमृतं देवात्मभावम्* - भ.पू.पा. शंकराचार्य) अमृतत्व म्हटले आहे. मोक्ष अद्वितीय आत्मज्ञानानेच होतो. राजा गोकर्णाला जाऊन मुक्त झाला म्हणजे दोषमुक्त झाला आणि

ज्ञानाचा अधिकारी झाला असा अर्थ आहे.५२. असे हे गोकर्ण परमपवित्र क्षेत्र साधुसंतांना आश्रयभूत आहे. म्हणून संतांचा प्राणच असे श्रीपाद तिथेच राहिले.५३. सज्जनांना जन्ममरणरूपी संसारापासून सोडवीत तिथे (गोकर्ण क्षेत्री) राहून ते श्रीपाद कृष्णाकांठी कुरुगड्डी येथे जाऊन अदृश्य झाले.५४.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सहावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## । अथ सप्तमोऽध्यायः।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधूनुद्धर्तुकामोऽथ कुतो लीलाविहार्यभूत् । अदृश्यो भगवांस्तत्तु श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**अतीन्द्रियोऽपि दृश्योऽत्र भूत्वा लीलात्मना पुनः । अवतारप्रसङ्गेन जातोऽदृश्य इदं शृणु ।।२।।**
**तत्राभूच्छान्दसः कश्चिदम्बिका नाम तद्वधूः । कुपुत्रं सुषुवे दैवात्स्तब्धं हीनमतिं जडम् ।।३।।**

अथ साधून् उद्धर्तुकामः लीलाविहारी भगवान तु कुतो अदृश्यो अभूत्? तत् सादरं श्रोतुं इच्छामि।१। अतीन्द्रियः अपि लीलात्मना दृश्यः भूत्वा पुनः अवतारप्रसंगेन अदृश्यः जातः। इदं शृणु।२। तत्र कश्चित् छांदसः अभूत्। तत्+वधूः अम्बिका नाम दैवात् स्तब्धं, हीनमतिं, जडं कुपत्रं सुषुवे।३।

श्रीगणेशाय नमः। मागच्या अध्यायांत 'श्रीगुरू साधूंना जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवतात' असे सांगितले; ते कोणत्या साधनाने?, हा प्रश्न अपेक्षून, विशेषतः मंद अधिकाऱ्यांसाठी, 'ज्ञानयोगांतच अंतर्भूत असलेल्या भक्तियोगाने', असे उत्तर ह्या अध्यायात दर्शविले आहे. **सातव्या अध्यायी ब्राह्मणीचे दुःख परिहरले। चोरांस मारून मृत द्विजास उठवीले।।** नामधारक विचारतात, साधूंचा उद्धार करूं इच्छिणारा लीलादेहाने विचरणारा भगवंत कां अदृश्य झाले हे मी आदरपूर्वक ऐकूं इच्छितो.१. सिद्धमुनी सांगतात, मन, बुद्धी, इंद्रियांना अगोचर असलेले श्रीदत्तप्रभू लीलादेहाने प्रकट झाले. पुढे पुन्हां दुसरा अवतार घ्यायचा असल्याने ते अंतर्धान पावले; ती गोष्ट सांगतो, ऐक.२. तिथे कुरुपुरांत एक वैदिक ब्राह्मण आपली पत्नी अंबिकेसह राहत होता. दैवयोगाने तिने एका मठ्ठ, मंदमती, वेडसर मुलाला जन्म दिला.३.

**वर्णधर्मोपनीतं तं सावित्र्युच्चारणाक्षमम् । ताडयन्तं निवार्याह स्वपतिं वैदिकं वधूः ।।४।।**
**भो जडोऽर्भोऽश्मवद्योनेरेवालं खेदहेतुना । ताडनेन त्यजाम्यस्मिंस्ताडितेऽसून्सुधीरिति ।।५।।**
**सोऽप्यजाकण्ठकुचवत्तं मत्वाश्रुत्य तद्वचः । तूष्णीं तस्थौ ततो विप्रः कालेनाल्पीयसा मृतः ।।६।।**
**तत्र पुत्रान्विता माता जीवनं याच्ञयाऽकरोत् । काले याते कियत्येवं निन्दां चक्रुर्द्विजोत्तमाः ।।७।।**

वर्णधर्म+उपनीतं (अपि) सावित्री+उच्चारण+अक्षमं तं ताडयन्तं वैदिकं स्वपतिं निवार्य वधू आह।४। भो योनेः+एव अर्भः अश्मवत् जडः (अस्ति)। खेदहेतुना (तस्य) ताडनं अलम्। सुधीः, अस्मिन् ताडिते असून् त्यजामि।५। सः अपि तत्+वचः श्रुत्वा, तं अजा+कंठ+कुच+वत् मत्वा तूष्णीं तस्थौ। ततो अल्पीयसा कालेन विप्रः मृतः।६। पुत्र+अन्विता माता तत्र याच्ञया जीवनं अकरोत्। एवं कियति काले याते द्विज+उत्तमाः निन्दां चक्रुः।७।

आठव्या वर्षी ब्राह्मणाची मुंज करावी ह्या धर्माज्ञेप्रमाणे त्याच्या पित्याने त्याची मुंज लावून दिली तरी त्याला गायत्रीमंत्राचा साधा उच्चारही करतां येईना. त्यामुळे त्याच्यावर रागावून तो वैदिक ब्राह्मण त्या मुलाला मारूं लागला. ते न पाहवून त्याची पत्नी त्याला अडवून म्हणाली.४. 'अहो नाथ! जन्मतःच हा बाळ दगडासारखा बुद्धिहीन आहे. त्याच्यावर रागावून काय उपयोग आहे? आपण वैफल्याने त्याला असे ऊठसूट मारूं नका. आपण सूज्ञ आहांत. याउप्पर त्याला असे बडवाल तर मीच जीव देईन!'५. त्या ब्राह्मणानेही तिचे ते बोलणे ऐकले आणि 'हा शेळीच्या गळ्याला लोंबणाऱ्या स्तनाप्रमाणे निरुपयोगी आहे' असा विचार करून गप्प राहिला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी तो ब्राह्मण मरण पावला.६. मग ती माता आपल्या पुत्राबरोबर त्या कुरुपुरांत भिक्षा मागून चरितार्थ चालवूं लागली. असा कांही काळ गेल्यावर त्या गांवातले श्रेष्ठ ब्राह्मण त्याची निंदा करूं लागले.७.

**सूर्यर्च्यजैषा वृत्तिस्ते गर्ह्याऽस्माकं न रोचते । इतो व्रज त्यजासून्वा तैरित्युक्तो नदीं ययौ ।।८।।**
**कृष्णाविष्टं समं मात्रा मर्तुकामं विलोक्य तौ । निषिध्योचेऽनुकम्पार्द्रः श्रीपादस्तीरवास्यसौ ।।९।।**
**साहसं मा कुरु ब्रह्मन्नात्महत्या हि दुर्वहा । भवे भवेऽप्यतोऽत्रैव सम्प्राप्तसहनं वरम् ।।१०।।**

हे सूरि+अर्च्यज! ते एषा गर्ह्या वृत्तिः अस्माकं न रोचते। इतो व्रज वा असून त्यज।८। तैः इति उक्तः (पुत्रः) मात्रा समं मर्तु+कामं नदीं ययौ। कृष्णाविष्टं तौ विलोक्य असौ तीरवासी श्रीपादः अनुकम्पा+आर्द्रः उचे।९। हे ब्रह्मन्! साहसं मा कुरु। आत्महत्या हि दुर्वहा। अतो भवे भवे अत्र एव संप्राप्त+सहनं वरम्।१०।

'विद्वानांत पूज्य असलेल्या पित्याच्या पोटी जन्म घेऊन तू ही जी आईच्या भिकेवर पोट भरण्याची निंद्य वृत्ती अवलंबिली आहेस ती आम्हांला रुचत नाही. तूं इथून निघून जा किंवा कुठे तरी जाऊन जीव दे!' त्यांच्या ह्या वक्तव्याने व्यथित होऊन तो मुलगा आपल्या मातेसह जीव देण्यासाठी नदीवर गेला.८. जीव देण्यासाठी कृष्णेत प्रवेश करणाऱ्या त्या मायलेकरांना पाहून तीरावर असलेल्या ह्या श्रीपादप्रभूंना दया आली आणि ते म्हणाले.९. 'अरे ब्राह्मणा! असा अविचार करूं नकोस. जाणीवपूर्वक ब्राह्मणाने आत्महत्या केली तर आत्महत्येच्या पापाबरोबरच ब्रह्महत्येचेही पाप लागते. ईशावास्य उपनिषदात(३) सांगितल्याप्रमाणे आत्महत्या करणारे लोक मृत्यूनंतर सूर्यरहित गाढ अंधाराच्या लोकांत जातात. म्हणून जन्मोजन्मी आपल्या प्रारब्धाने जे जे कष्ट प्रप्त होतील ते ते भोगणेच बरे आहे.'१०.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**प्राज्ञोद्भूतकुपुत्रत्व-हेतुनैवाखिला हि माम् । धिक्कुर्वन्त्यपि नेक्षन्ति तत्किं कार्यमतःपरम् ॥११॥**

॥ श्रीपाद उवाच ॥

**हत्यया लिप्स्यसेऽग्रेऽतो दुःखं निस्तीर्य दैविकम् । शिवतोषात्सुपुत्रस्ते भविष्यति भवान्तरे ॥१२॥**

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**त्वयोक्तं साध्वहं कुर्यां तथैव तु कथं भवेत् । शिवतोषः पुरा केन कृतः श्रावय विस्तरात् ॥१३॥**

ब्राह्मणी उवाच। प्राज्ञ+उद्भूत+कुपुत्र+हेतुना एव अखिला (जना) मां धिक् कुर्वति हि। न ईक्षन्ति अपि। तत् अतः परम् किं कार्यम्?।११। श्रीपाद उवाच। हत्यया लिप्स्यसे। अतो दैविकं दुःखं निस्तीर्य अग्रे शिव+तोषात् भव+अंतरे ते सुपुत्रः भविष्यति।१२। ब्राह्मणी उवाच। त्वया साधु उक्तम्। अहं तु तथा एव कुर्याम्। शिवतोषः कथं भवेत्, पुरा केन कृतः (तत्) विस्तरात् श्रावय।१३।

मुलगा कांहीच बोलला नाही. आईनेच सांगितले. विद्वानाच्या पोटी हा नतद्रष्ट जन्माला आला. ह्याच गोष्टीवरून सर्वजण माझा धिक्कार करतात. आम्हांला डोळ्यांसमोरही येऊं देत नाहीत. अशा परिस्थितीत आम्ही (जीव देण्यावांचून दुसरे) काय करणार?११. श्रीपाद म्हणाले, '(तसे करशील तर) (आत्म)हत्येचा दोष लागेल. यासाठी कर्माने प्राप्त झालेले दुःख भोगून टाक. पुढे जर शंकराला (उपासनेने) प्रसन्न करशील तर जन्मांतरी तुला चांगला मुलगा होईल.'१२. ब्राह्मणी म्हणाली, 'आपण उत्तम सांगितले. मी अवश्य त्याचप्रमाणे करीन. भगवान शिव कसे प्रसन्न होतील? पूर्वी कुणी त्यांना अशा रीतीने प्रसन्न केले? हे मला आपण विस्ताराने सांगाल तर माझीही श्रद्धा आणि भक्ती दृढ होऊन मी तसे करीन.'१३. श्रीपाद सांगूं लागले, 'पूर्वीं उज्जैन नगरीत चंद्रसेन नांवाचा राजा होता. त्याचा मणिभद्र नांवाचा मित्र शंकराचा भक्त होता. त्याला भगवान शंकरांनी प्रसन्न होऊन इच्छिलेली वस्तू देणारा चिंतामणी दिला.१४.

## ।। श्रीपाद उवाच ।।

**उज्जयिन्यां पुरा चन्द्र-सेनराजसखोऽलभत् । मणिभद्रः शिवाच्छैवश्चिन्तामणिमभीष्टदम् ।।१४।।**
**तं ज्ञात्वार्घादिनाऽलभ्यं युद्धायाभ्यागतान्नृपान् । श्रुत्वाऽप्येकाग्रचित्तोऽसौ प्रदोषेऽपूजयच्छिवम् ।।१५।।**
**मन्दानङ्गप्रदोषे तं मणिं भूपं तथाविधम् । दृष्ट्वा गोपसुतास्तद्वत्स्वाङ्गणे चक्रुरर्चनम् ।।१६।।**
**गोप्यो निवार्य पत्राद्यैर्लिङ्गकल्पनयोपलम् । भजतो निन्युरत्तुं तांस्तस्थौ तत्रैकबालकः ।।१७।।**
**प्रसह्याप्युद्धृतोऽर्चां स मात्रोद्वास्यापतद्भुवि । शम्भुपूजाभङ्गभिया निर्विण्णो मर्तुमुद्यतः ।।१८।।**

श्रीपाद उवाच। पुरा उज्जयिन्यां चंद्रसेन+राज+सखः मणिभद्रः शिवात् अभीष्टदं चिंतामणिं अलभत्।१४। तं अर्घ+आदिना अलभ्यं ज्ञात्वा नृपान् युद्धाय अभ्यागतान् श्रुत्वा अपि असौ एकाग्रचित्तः प्रदोषे शिवं अपूजयत्।१५। तं मणिं, भूपं (च) मंदानंग+प्रदोषे तथाविधं दृष्ट्वा गोपसुताः स्वाङ्गणे तद्वत् अर्चनं चक्रुः।१६। लिंग+कल्पनया उपलं भजतः तां गोप्यो निवार्य अत्तुं निन्युः। तत्र एक बालकः तस्थौ।१७। मात्रा अर्चां उद्वास्य प्रसह्य उद्धृतः अपि सः शम्भु+पूजा+भंग+भिया निर्विण्णो मर्तुम् उद्यतः भुवि अपतत्।१८।

तो चिंतामणी धनादिकांच्या मोबदल्यांत मागूनही तो राजाने न दिल्यामुळे परकीय राजे सर्व बाजूंनी युद्धासाठी चालून आल्याचे समजूनही राजा आणि मणिभद्र प्रदोषकाळी एकाग्रचित्ताने शंकरांचे पूजन करीत होते.१५. त्या राजाला आणि मणिभद्राला शनिप्रदोषाच्या पर्वांत तशी पूजा करतांना पाहून कांही गवळ्याच्या मुलांनी आपल्या आंगणांत तशीच पूजा आरंभिली.१६. लिंगाच्या आकाराचा दगड ठेवून पानाफुलांनी त्यांची पूजा करणाऱ्या त्या मुलांना, त्यांच्या माता ज्या गोपी, त्यांनी जेवणासाठी ओढून नेले. सगळी मुले याप्रमाणे निघून गेली; पण एक बालक मात्र पूर्वजन्मींच्या भक्तीच्या संस्कारांमुळे पूजा टाकून न जातां तिथे तसाच बसून राहिला.१७. आईने पूजा विस्कटून त्याला जबरदस्तीने ओढूनही तो गोपीकुमार शिवपूजेचा भंग होईल या भीतीने अत्यंत खिन्न होऊन प्राण त्यागण्याच्या इच्छेने जमिनीवर पडला.१८.

**तद्भावं विश्वसाक्षीशो ज्ञात्वाऽविष्कृत्य शोभनम् । स्वं रूपं बालमाश्वास्य वरं वृण्विति तं जगौ ॥१९॥**
**बालोऽपि दिव्यरूपं तं नत्वोचे भुवनेश्वर । मात्रोत्सृष्टाऽत्र ते पूजा तन्मन्तुं क्षन्तुमर्हसि ॥२०॥**

**॥ शिव उवाच ॥**

**भक्त्या सायुज्यभाङ्मेऽसि कृतं मात्रा त्वबोधतः । नायं मन्तुः सापि भूयाद्विष्णुमाताऽर्चनेक्षणात् ॥२१॥**
**इत्युक्त्वान्तर्दधे सोऽभूद्भास्वल्लिंगं य आगताः । त ऊचुः पुण्यश्लोकार्थं दोषाऽप्यर्कोऽत्र तिष्ठति ॥२२॥**
**धन्येन सह योद्धव्यं नास्माभिरिति ते नृपाः । निश्चित्य स्निग्धभावेन तौ द्रष्टुं सर्व आययुः ॥२३॥**

विश्वसाक्षी ईशः तत्+भावं ज्ञात्वा स्वं शोभनं रूपं आविष्कृत्य, बालं आश्वास्य वरं वृणु इति तं जगौ।१९। बालः अपि तं दिव्यरूपं नत्वा ऊचे, (हे) भुवनेश्वर! मात्रा ते पूजा उत्सृष्टा, तं मन्तुं क्षन्तुं अर्हसि।२०। शिव उवाच। त्वं भक्त्या मे सायुज्यभाक् असि। मात्रा कृतं तु अबोधतः। न अयं मन्तुः। सा अपि अर्चन+ईक्षणात् विष्णुमाता भूयात्।२१। इति उक्त्वा सः अन्तर्दधे। लिङ्गं भास्वत् अभूत्। ये आगताः (राजानः) ते ऊचुः अत्र पुण्यश्लोक+अर्थं दोषा अपि अर्कः तिष्ठति।२२। अस्माभिः धन्येन सह न योद्धव्यम्। इति निश्चित्य ते सर्वे नृपाः स्निग्ध+भावेन तौ द्रष्टुं आययौ।२३।

जगताचा द्रष्टा जो भगवान शंकर त्याने त्या बालकाचा भक्तिभाव जाणला आणि आपले मनोहर रूप त्याच्यापुढे प्रकट केले. त्या बाळाची समजूत घालून ते त्याला वर माग असे म्हणाले.१९. त्या गोपाळाने त्या दिव्य रूपाला नमस्कार केला आणि म्हणला, माझ्या आईने आपली पूजा मोडून टाकली त्या अपराधाची आपण क्षमा करावी.२०. भगवान शंकर उत्तरले, तुझ्या भक्तीपोटी तुला माझे सायुज्य दिले! तुझ्या आईने अजाणतां केल्याने हा अपराधच होत नाही. उलट माझी पूजा तिने पाहिली ह्या पुण्याईने ती जन्मांतरी विष्णूची आई होईल.२१.असे बोलून शिवभगवान अंतर्धान पावले. गोपबालकाने पूजिलेले ते दगडाचे लिंग एकदम सूर्यासारखे प्रकाशले. त्याचा प्रकाश नगरभर पसरलेला पाहून युद्धासाठी आलेले राजे लोक म्हणू लागले, हा राजा केवढा पुण्यश्लोक आहे! त्याच्या नगरांत रात्रीही सूर्य थांबलेला दिसतो!२२.

**पूजां कृत्वापि राट् द्योत-हेतुं निश्चित्य तैः सह । नृपैर्गोपाङ्गणं गत्वा प्राप लिङ्गेक्षणान्मुदम् ।।२४।।**
**श्रुत्वा गोपमुखात्सर्वं तुष्टास्तस्मै नृपाः श्रियम् । दत्वा गोपाधिपत्यं च स्वं स्वं स्थानं ययुर्मुदा ।।२५।।**
**सा तु प्रेत्य यशोदाख्या गोपी भूत्वा हरिं सुतम् । प्रापेशतोषात्तस्मात्ते तथा भूयाच्छिवार्चनात् ।।२६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**कष्टाद्दैवाच्छिवे तुष्टे फलं भाव्यधुनामुना । कष्टेनायुः कथं लङ्घ्यं मातृत्वेनाव मामतः ।।२७।।**

राट् अपि पूजां कृत्वा तैः नृपैः सह द्योत+हेतुं निश्चित्य गोप+अङ्गणं गत्वा लिङ्ग+ईक्षणात् मुदं प्राप।२४। गोप+मुखात् सर्वं श्रुत्वा तुष्टाः नृपाः तस्मै श्रियं गोप+अधिपत्यं च दत्वा मुदा स्वं स्वं स्थानं ययुः।२५।

हा राजा धन्य आहे! अशाबरोबर आपण युद्ध करणे योग्य नाही, असा निश्चय करून ते सगळे राजे स्नेहभावाने त्या राजाच्या आणि मणिभद्राच्या दर्शनासाठी आले.२३. राजानेही पूजा विधिवत् संपन्न केली आणि त्या राजांसह प्रकाशाचे मूळ शोधत गवळीवाड्यात आले.२४. तिथे त्या लिंगाचे दर्शन घेऊन ते सर्व आनंदित झाले. त्या गोपाळाच्या तोंडून सर्व ऐकून सर्वही राजांना हर्ष झाला. त्यांनी त्या गोपाळाला विपुल धन देऊन गौळी समाजाचा प्रमुख केले आणि आनंदाने आपापल्या ठिकाणी निघून गेले.२५. ती गोपी मृत्यूनंतर यशोदा नांवाची गोपी म्हणून जन्मली आणि भगवान शंकरांच्या कृपेने साक्षात् विष्णूचा अवतार जो गोपाळकृष्ण, त्याची आई झाली. त्याचप्रमाणे तू शंकरांची पूजा केलीस तर तुलाही विष्णूसारखा मुलगा होईल.२६. ब्राह्मणी म्हणाली, 'प्रयासाने आणि दैवयोगाने शंकर प्रसन्न झालेच तर पुढच्या जन्मी हे फळ मिळेल. आतां ह्या मंदमती मुलासह हे कष्टमय आयुष्य कसे घालवावे? आपणच मला आई समजून माझे रक्षण करावे.'२७.

**इत्यशाठ्यं सकारुण्यं श्रुत्वा प्रीतो दयार्द्रधीः । ओमित्युक्त्वा दधौ पाणिं दुष्प्रापं मूर्खमूर्धनि ।।२८।।**
**सहसा गीष्पतिसमो बभूव श्रुतिशास्त्रवित् । मातृभक्तौ विनीतं तं नियुज्याहाम्ब मे शृणु ।।२९।।**
**विस्मृत्याऽकमनेनेश-पूजयायुःक्षयं कुरु । पुत्रो भाविभवे मादृक्ते भविष्यति वा इति ।।३०।।**
**साऽप्यत्यर्थं प्रहृष्टा तदाज्ञया सहसूनुना । ग्रामं गत्वेशमानर्च विद्वन्मान्य सुतान्विता ।।३१।।**
**मादृङ्नान्यो भवेयं चेन्नास्याः पुत्रो मृषा वचः । अतोऽवतीर्य तत्कुर्यामित्यमंस्ताज ईश्वरः ।।३२।।**

सा तु प्रेत्य यशोदा+आख्या गोपी भूत्वा ईश+तोषात् हरिं सुतं प्राप। तस्मात् ते शिव+अर्चनात् तथा भूयात्।२६। ब्राह्मणी उवाच। कष्टात् दैवयोगात् (च) शिवे तुष्टे भावि फलम्। अधुना अमुना कष्टेन आयुः कथं लङ्घ्यम्? अतः मां मातृत्वेन अव।२७। इति अशाठ्यं सकारुण्यं (वचं) श्रुत्वा दया+आर्द्र+धीः प्रीतः 'ॐ' इति उक्त्वा मूर्ख+मूर्धनि दुष्प्रापं पाणिं दधौ।२८। सः सहसा गीष्पति+समः श्रुति+शास्त्र+वित् बभूव। विनीतं तं मातृ+भक्तौ नियुज्य आह, '(हे)अम्ब! मे श्रुणु'।२९। अनेन अकं विस्मृत्य ईश+पूजया आयु+क्षयं कुरु। भावि+भवे ते मादृक् पुत्रो भविष्यति वा।३०। सा अपि अत्यर्थं प्रहृष्टा। तत् आज्ञया सूनुना सह ग्रामं गत्वा विद्वत्+मान्य सुत+अन्विता ईशं आनर्च।३१। मादृक् अन्यः न। अस्याः पुत्रः न भवेयं चेत् (मम) वचः मृषा (स्यात्)। अतः अवतीर्य तत् कुर्यां इति अजः ईश्वरः अमंस्त।३२।

हे तिचे निर्व्याज आणि काकुळतीचे बोलणे ऐकून दयाक्लिन्न अंतःकरणाचे श्रीपाद प्रसन्न झाले आणि त्यांनी 'ॐ' असे म्हणून आपला देवदुर्लभ हात त्या मठ्ठ मुलाच्या मस्तकावर ठेवला.२८. तो मंदमती मुलगा तेव्हां तत्काळ बृहस्पतीसारखा वेदशास्त्रसंपन्न झाला आणि त्याने श्रीपादप्रभूंना नमस्कार केला. त्याला आईची भक्ती करण्याचा आदेश देऊन श्रीपाद त्या ब्राह्मणीला म्हणाले, 'माते, माझे ऐक!'२९. 'ह्या तुझ्या विद्वान् पुत्रासह तूं तुझे पूर्वीचे सर्व दुःख विसरून जा आणि उरलेले जीवन शंकरांच्या पूजेत व्यतीत कर. येणाऱ्या जन्मात तुला अवश्य माझ्यासारखा पूज्य मुलगा होईल.'३०. ती ब्राह्मणीही अत्यंत आनंदित होऊन श्रीपादांची आज्ञा घेऊन आपल्या मुलासह गांवांत गेली. तिथे सर्व विद्वानांतही सन्मानित झालेल्या त्या मुलासह तिने आयुष्यभर शंकरांचे आराधन केले.३१.

**कृतावतारसङ्कल्पः कार्यानन्त्यान्न सोऽत्यजत् । लीलाङ्गं तत्र भजतामदृश्योऽप्यस्ति कामदः ।।३३।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सङ्कल्पवान्कथं कार्येऽपूर्णेऽप्यन्योऽभवत्कथम् । स्थित्वाद्यधाम्नाऽदृश्योऽपि भजतां कामदः कथम् ।।३४।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**कार्यानन्त्याद्विश्वबीजे सङ्कल्पानन्त्यमव्यये । नृणां कलिमलान्धानां स प्रत्यक्षोऽप्यदृश्यवत् ।।३५।।**

कृत+अवतार+संकल्पः सः कार्य+आनंत्यात् लीलाङ्गं न अत्यजत्। तत्र भजतां अदृश्यः अपि कामदः अस्ति।३३। नामधारक उवाच। कार्ये अपूर्णे अपि संकल्पवान् कथम्? आद्य+धाम्ना स्थित्वा अपि अन्यः कथं अभवत्? (तत्र) अदृश्यः अपि भजतां कामदः कथम्?३४। सिद्ध उवाच। विश्व+बीजे अव्यये कार्य+आनंत्यात् संकल्प+आनंत्यम्। कलि+मल+अंधानां नृणां सः प्रत्यक्षः अपि अदृश्यवत् (अस्ति)।३५।

'माझ्यासारखा त्रिभुवनांत कुणीच नाही कारण मी एकमेवाद्वितीय आहे. म्हणजे मलाच तिच्या पोटी विशुद्ध सत्त्वात्मक स्वेच्छामय रूपाने अवतार घेतला पाहिजे. तरच माझे वचन सत्य होईल' असा त्या निर्विकार परमेश्वराने विचार केला.३२. अशा रीतीने पुढच्या अवताराचा संकल्प करूनही त्या दत्तप्रभूनी आपले भक्तरक्षणादि कार्य कधीही न संपणारे असल्याने तो लीलादेह टाकला नाही. तिथे श्रीपादवल्लभ अशुद्ध चित्ताच्या लोकांना अदृश्य असले तरी आपल्या भक्तांच्या कामना पूर्ण करीत आजही विद्यमान आहेत. मुंडकोपनिषदांत (२:१:२) ब्रह्माचे वर्णन शुद्ध आणि मन-प्राणानी रहित असे केले आहे. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:३) काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधीरता, लज्जा, भीती, बुद्धी ही सर्व मनाचीच रूपे सांगितली आहेत. तर मग अमनस्क परमेश्वराचा संकल्प कसा होऊं शकतो? तर परब्रह्माच्या ईक्षणासारखाच संकल्पाचाही प्रयोग निर्दोष आहे. माया त्याच्या आधीन असल्याने तो स्वतंत्रच आहे असा भाव आहे.३३.

**प्राग्वृत्तं शृण्वदृष्टेऽस्मिन्द्विजः कश्चित्कुटुम्ब्यभूत । धीमान्द्यात्स वणिग्वृत्तिः श्रीपादाङ्घ्र्यर्पितान्तरः ॥३६॥**
**व्यापारे मेऽधिलाभश्चेद्भूयात्तदनुसारतः । कुर्यां कुरुपुरे विप्र-भोजनं श्रीशतुष्टये ॥३७॥**
**इत्युक्त्वाऽगात्स्मरन्छ्रीशं व्यापारार्थं ततो धनम् । लेभे भूरि तदादाय ययौ संकल्पसिद्धये ॥३८॥**
**मार्ग एकाकिनं यान्तं तं सार्थं प्रेक्ष्य तस्कराः । सुहृत्तया तदनुगा भूत्वा तं विजनेऽहनन् ॥३९॥**

अस्मिन् अदृष्टे (सति)प्राक् वृत्तं शृणु। कश्चित् कुटुंबी द्विजः अभूत्। धी+मांद्यात् सः वणिक्+वृत्तिः श्रीपाद+अङ्घ्रि+अर्पित+अंतरः (स्यात्)।३६। मे व्यापारे अधिलाभः भूयात् चेत् तत्+अनुसारतः कुरुपुरे श्री+ईश+तुष्टये विप्र+भोजनं कुर्याम्।३७। इति उक्त्वा श्रीशं स्मरन् व्यापारार्थं अगात्। ततो भूरि धनं लेभे। तत् आदाय संकल्प+सिद्धये ययौ।३८। मार्गे एकाकिनं स+अर्थं यान्तं तं प्रेक्ष्य तस्कराः सुहृत्तया तत्+अनुगा भूत्वा तं विजने अहनन्।३९।

नामधारकास पडलेले तीन प्रश्न तो विचारीत आहे. कुरवपूरचे कार्य पूर्ण झालें नसतांना दुसऱ्या अवताराचा संकल्प कसा केला? पूर्वरूपाने राहूनही वेगळे रूप कसे धारण केले? श्रीपाद अदृश्य असूनही त्या कुरवपुरांत भक्ताच्या कामना कसे पूर्ण करतात? पुढील श्लोकापासून सिद्धमुनी याच तीन प्रश्नांची उत्तरे सांगत आहेत.३४. जगताचे मूळ असणाऱ्या परमात्म्याची कार्ये अनंत आहेत; त्यानुसार संकल्पही अनंतच होतात. श्रीपादांचे जरी कुरवपुरांत प्रत्यक्षच वास्तव्य असले तरी कलिकाळाच्या दोषाने आंधळ्या झालेल्या लोकांना ते अदृश्यासारखेच आहेत.३५. हे श्रीपादमुनी अदृश्य झाल्यानंतर एक जुनी घडलेली गोष्ट ऐक. कोणी एक ब्राह्मण गृहस्थ होता. बुद्धीच्या मंदतेमुळे तो ब्रह्मकर्म न करतां व्यापाराने चरितार्थ करीत असे. त्याच्या मनांत श्रीपादश्रीवल्लभांच्या ठायीं निस्सीम भक्ती होती.३६. मला व्यापारांत भरपूर नफा झाल्यास त्या प्रमाणांत श्रीपादवल्लभांना कुरुगड्डीत ब्राह्मणभोजनाने संतुष्ट करीन.३७. असा मनोमन नवस बोलून श्रीपादांचे स्मरण करीत तो परगांवी व्यापाराला निघाला. तेव्हां त्याला भरपूर पैसा मिळाला. तो पैसा घेऊन आपला बोललेला संकल्प पूर्ण करण्यासाठी तो कुरुगड्डीला निघाला.३८.

**तदैव सहसा तत्र श्रीपादः शूलपात्रधृक् । प्राप्य ताञ्छितधारेण त्रिशूलेन जघान सः ॥४०॥**
**एकस्तमेत्य शरणं प्रोचे चोरधिया तु नो । सङ्गीभूतोऽस्मि मां ज्ञात्वा यथेष्टं कुरु भो प्रभो ॥४१॥**
**श्रीपादोऽपि सकारुण्यां श्रुत्वोक्तिं विमलान्तरम् । ज्ञात्वा तं योजयामास तद्रक्षायै कृपार्द्रधीः ॥४२॥**
**कबन्धे तच्छिरः कृत्वा भस्माक्तं जलमन्त्रितम् । सजीवं तं द्विजं कृत्वा क्षणादन्तर्दधे स तु ॥४३॥**
**स सुप्तोत्थितवद्बुध्वा दृष्ट्वा चोरान्मृतान् द्विजः । हतशेषमुखात्सर्वं श्रुत्वा खिन्नान्तरोऽभवत् ॥४४॥**

तदा एव शूल+पात्र+धृक् श्रीपादः सहसा तत्र प्राप्य सः तान् शित+धारेण त्रिशूलेन जघान।४०। एकः तं शरणं एत्य प्रोचे। 'भो प्रभो, (अहं) तु चोर+धिया नो संगीभूतः अस्मि। मां ज्ञात्वा यथा+इष्टं कुरु'।४१। कृपा+आर्द्र+धीः श्रीपादः अपि सकारुण्यां उक्तिं श्रुत्वा तं विमल+अंतरं ज्ञात्वा तं तत्+रक्षायै योजयामास।४२। तत् शिरः कबंधे भस्म+आक्तं जल+मंत्रितम् कृत्वा तं द्विजं सजीवं कृत्वा स तु क्षणात् अन्तर्दधे।४३। स द्विजः सुप्त+उत्थितवत् बुद्ध्वा मृतान् चोरान् दृष्ट्वा हत+शेष+मुखात् सर्वं श्रुत्वा खिन्न+अंतरः अभूत्।४४।

त्या वाटेने त्याला पैसे घेऊन एकट्यानेच जातांना चोरांनी पाहिले आणि त्याच्याशी मित्रत्वाचे नाटक करून त्याला जंगलांत निर्जन ठिकाणी मारून टाकले.३९. त्याच वेळी शूल आणि कमंडलु धारण केलेले श्रीपाद एकाएकी तिथे आले आणि त्या चोरांना त्यांनी आपल्या तीक्ष्ण त्रिशूलाने ठार मारले.४०. त्यांच्यापैकीं एकजण श्रीपादांना शरण येऊन म्हणाला, 'महाराज! मी हे चोर असल्याचे न जाणतां यांच्याबरोबर आलो. आपण (हे) ओळखून आपल्याला वाटेल त्याप्रमाणे करा.'४१. दयेने ओथंबलेल्या अंतःकरणाच्या श्रीपादांनी ही काकुळतीची विनवणी ऐकून आणि त्याचे मन निष्कपट असल्याचे जाणून त्या ब्राह्मणाच्या रक्षणासाठी त्याची योजना केली.४२. त्या ब्राह्मणाचे डोके धडाला जोडून भस्मयुक्त मंतरलेल्या पाण्याने त्याला जिवंत केले आणि ते श्रीपाद क्षणार्धांत गुप्त झाले.४३. तो ब्राह्मण झोंपेतून जागावे तसा उठला. तेव्हां मरून पडलेले चोर त्याला दिसले. त्यांच्यापैकी उरलेल्याच्या तोंडून त्याने सर्व हकीकत ऐकली आणि तो खिन्नचित्त झाला.४४.

**कृत्वा तु मत्कृते कृच्छ्रं जातोऽयं चोरगोचरः । सर्वदाऽऽराधितो दैवान्नायं मे दृष्टिगोचरः ।।४५।।**
**इत्युक्त्वा धनमादाय गत्वा कुरुपुरं द्विजः । चतुःसहस्रसद्विप्र-भोजनं श्रद्धया व्यधात् ।।४६।।**
**ततः श्रीशप्रसादात्स सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । इत्याद्या भूरिशो वृत्ताः सत्यदृश्येऽपि तत्कथाः ।।४७।।**
**प्रत्यक्षस्तु सतां तत्र कच्चराणां त्वगोचरः । सोऽप्यन्यत्रावतीर्यात्र स्वरूपेणेष्टकामदः ।।४८।।**

'मत्कृते कृच्छ्रं कृत्वा तु अयं चोर+गोचरः जातः। सर्वदा आराधितः अयं दैवात् मे दृष्टि+गोचरः न'।४५। इति उक्त्वा द्विजः धनं आदाय कुरुपुरं गत्वा श्रद्धया चतुः+सहस्र+सत्+विप्र+भोजनं व्यधात्।४६। ततः सः द्विजः श्रीश+प्रसादात् उभयीं सिद्धिं प्राप। अदृश्ये सति अपि इत्याद्या तत्+कथाः भूरिशः वृत्ताः।४७। सः सतां तत्र प्रत्यक्षः, कच्चराणां तु अगोचरः (सन्) अन्यत्र अवतीर्य अपि अत्र स्वरूपेण इष्ट+कामदः।४८।

तो म्हणाला, 'ह्या श्रीपादांनी माझ्यासाठी एवढे कष्ट केले. पण चोरांना दर्शन देऊनही, सर्वदा त्यांची आराधना करणाऱ्या मला मात्र त्यानी दर्शन दिले नाही!'४५. असा खेद व्यक्त करून तो आपले धन घेऊन कुरुगड्डीला गेला. तिथे त्याने भक्तिभावाने चार हजार उत्तम ब्राह्मणांना भोजन घातले.४६. नंतर त्या ब्राह्मणाचे श्रीपादवल्लभांच्या प्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक कल्याण झाले. श्रीपादगुरू अदृश्य झाल्यानंतरही अशा कित्येक घटना घडल्या आहेत.४७. त्या श्रीगुरूंचा पापी लोकांना अनुभव येत नसला तरी साधूंना मात्र ते प्रत्यक्षच आहेत. दुसऱ्या ठिकाणी अवतरूनही इथे आपल्या पूर्वरूपाने ते भक्तांच्या कामना पुरवीत असतात.४८.

**वेदयज्ञतपोदान-प्रदिष्टफलतोऽधिकम् । श्रीपादाधिष्ठितस्थान-वासिनां द्राक्फलं लभेत् ।।४९।।**
**यत्र कुत्रापि ये केचिच्छ्रीपादाङ्घ्रिसरोरुहे । संस्मरन्त्यपि तेभ्यः स कामानिष्टान्ददात्यलम् ।।५०।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीपादमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः।।७।।**

वेद+यज्ञ+तपः+दान+प्रदिष्ट+फलतो श्रीपाद+अधिष्ठित+स्थान+वासिनां अधिकं फलं लभेत्।४९। यत्र कुत्र अपि ये केचित् श्रीपाद+अंघ्रि+सरोरुहे संस्मरन्ति अपि तेभ्यः सः इष्टान् कामान् अलं ददाति।५०।

वेदांच्या अध्ययनादिकांनी, यज्ञादींच्या अनुष्ठानाने, शरीरशोषणादि तपांनी, सत्पात्री केलेल्या दानाने मिळणाऱ्या फळापेक्षांही अधिक - म्हणजे मोक्षरूपी फळ, श्रीपादगुरूंनी पावन केलेल्या त्या कृष्णतीरींच्या स्थानांत राहणाऱ्यांना शीघ्र मिळते. जीवाचा देहाशी संबंध असतो त्याहून श्रीपादरूपाने अवतरलेल्या ईश्वराचा संबंध वेगळा आहे. जीव अविद्येच्या योगाने मिथ्याभूत षड्विकारयुक्त देहाशी ममत्वाने बद्ध होतो. याउलट नित्य, मुक्त, शुद्ध, मुक्त आणि सत्य स्वभावाचा भगवंत आपल्या योगमायेने चैतन्यघन असा लीलाविग्रह धारण करतो. साहजिकच त्याचे अधिष्ठान झालेल्या पुण्यक्षेत्रांतल्या निवासाने अनायासच त्याच्या प्रियतम भक्तांचा संग लाभतो. बहुशः भगवद्भक्त भगवंतांचे अधिष्ठानभूत अशा पुण्यक्षेत्रांतच राहतात. त्यामुळे तिथे राहणाऱ्यांना भगवद्गुणांचे श्रवण आणि कीर्तनही घडते. इतर ठिकाणी विघ्नबाहुल्याने न होणारे ध्यानसुद्धां साक्षात् श्रीपादांच्या निवासाने विघ्नरहित होते. अशा रीतीने ध्यानयोग सिद्ध झाला की विनासायास मोक्ष लाभतो. केवळ ज्ञानानेच होणारा मोक्ष, ईश्वराच्या कृपेने ज्ञानाची साधने अनुकूल झाल्याने विनाप्रतिबंध ज्ञानलाभ या क्षेत्रांतून होतो असा भावार्थ आहे.४९. इतरही कोणत्याही स्थानी जे कुणी श्रीपादांच्या चरणकमलांचे स्मरणसुद्धां करतात त्यांचेही ईप्सित मनोरथ ते शीघ्र पुरवितात.५०.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सातवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अष्टमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। अथ अष्टमोऽध्यायः।**

**आठव्या अध्यायी थोर। कथिला नरहरी अवतार। दाउनी बाललीला विचित्र। घेई संन्यासाश्रम पवित्र।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**ब्रह्मन् कुत्रावऽतीर्यासौ किं चकारास्य चेष्टितम् । मायाश्रितस्याप्रमेयं ब्रूहि शुश्रूषवेऽर्थदम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच।।**

**उदग्देशेऽवतीर्णस्य दीनानुद्धर्तुमीशितुः । वक्ष्येऽल्पकं साधुयोगि-दुर्विभाव्यं हि चेष्टितम् ।।२।।**
**या श्रीपादोपदेशेन प्रदोषेऽजमतोषयत् । सा प्रेत्योत्तरदेशे स्त्रीर्जाता ब्रह्मकुलेऽमले ।।३।।**

नामधारक उवाच, (हे) ब्रह्मन्, असौ कुत्र अवतीर्य किं चकार? अस्य माया+आश्रितस्य अप्रमेयं अर्थदं चेष्टितं शुश्रूषवे (मे) ब्रूहि।१। दीनान् उद्धर्तुं उदक् देशे अवतीर्णस्य ईशस्य चेष्टितं अहं अल्पकं वक्ष्ये। (तत्) हि साधु+योगि+दुर्विभाव्यं (अस्ति)।२। या (ब्राह्मणी) श्रीपाद+उपदेशेन प्रदोषे अजं अतोषयत्, सा प्रेत्य उत्तर+देशे अमले ब्रह्म+कुले स्त्रीः जाता।३।

श्रीगुरू भगवंतांच्या दुसऱ्या अवताराविषयी नामधारक प्रश्न करीत आहे. हे द्विजश्रेष्ठा, त्या भगवंतांनी कुठे अवतार घेतला आणि काय लीला केल्या? स्वेच्छेने मायेचा अंगीकार केलेल्या श्रीगुरूंच्या अचिंत्य पण अभीष्टार्थप्रद अशा चरित्राचे श्रवण करण्यास अत्सुक अशा मला आपण सांगा.१. सिद्धमुनी सूत्ररूपाने सांगतात, दीनजनांचा उद्धार करण्यासाठी उत्तरेच्या देशांत (वऱ्हाडांतील कारंजा येथे) अवतरलेल्या प्रभूंचे चरित्र मी किंचिन्मात्र सांगतो; कारण खरोखर त्यांच्या लीला साधूंना आणि योग्यांनासुद्धा आकळण्यास कठीण आहेत.२. (सातव्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे) ज्या ब्राह्मणीने श्रीपादश्रीवल्लभांच्या उपदेशानुसार प्रदोषकाली शिवाची आराधना करून प्रसन्न केले, ती मृत्यू पावल्यानंतर उत्तरेच्या (वऱ्हाड) प्रांतात (कारंजा गांवांत) पवित्र अशा (वैदिक) ब्राह्मण कुळांत स्त्री म्हणून जन्माला आली.३.

**धीरूपशीललक्ष्माढ्या सुसंस्कारा गुणान्विता । श्रीपादेन पुराम्बेति प्रोक्तत्वात्सा तदाह्वया ।।४।।**
**शिववृत्तिं माधवाख्यमनुरूपं द्विजं पिता । दृष्ट्वा तत्रैव तां तस्मै गृह्योक्तविधिना ददौ ।।५।।**
**सा पातिव्रत्यमास्थाय भेजे छायेव तं पतिम् । प्रदोषेऽपि शिवं पूर्व-संस्कारात् पत्यनुज्ञया ।।६।।**
**स्नेहोऽन्योन्याश्रयो भाव-बन्धोऽभूच्चक्रवाकवत् । तयोर्हर्षितयोरेवं गर्भमम्बा वरं दधौ ।।७।।**

(सा) धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्या सुसंस्कारा गुण+अन्विता अभूत्। पुरा श्रीपादेन अम्बा इति प्रोक्तत्वात् तत् आह्वया (प्रसिद्धा अभूत्)।४। पिता तत्र एव शिव+वृत्तिं अनुरूपं माधव+आख्यं द्विजं दृष्ट्वा तां तस्मै गृह्य+उक्त+विधिना ददौ।५। सा तं पतिं पातिव्रत्यं आस्थाय छाया+इव भेजे। पूर्वसंस्कारात् पति+अनुज्ञया शिवं अपि प्रदोषे (भेजे)।६। तयोः चक्रवाकवत् अन्यः+अन्य+आश्रयः स्नेहः भावबन्धः अभूत्। एवं हर्षितयोः तयोः अम्बा वरं गर्भं दधौ।७।

ती सारासारविवेक करणारी बुद्धी, सुंदर रूप, उत्तम स्वभाव आणि सुलक्षणांनी युक्त होती. तिचे संस्कारही चांगलेच होते आणि ती शांती आदि गुणानी मंडित होती. पूर्वजन्मी श्रीपादमुनींनी 'अम्बा' असे संबोधल्याने ह्या जन्मांतही ती त्याच नांवाने ओळखली जाऊं लागली.४. तिथे - कारंजालाच तिच्या वडिलांनी एक तिला अनुरूप असा शिवभक्त, माधव नांवाचा ब्राह्मण पाहून आपल्या या कन्येचे त्याला यथाविधी दान केले.५. त्या अंबेने पातिव्रत्य धर्माला अनुसरून आपल्या पतीची सावलीसारखी सेवा केली. तसेच पूर्वजन्मांतील संस्काराच्या प्रभावाने पतीच्या आज्ञेने प्रदोषकाळांत शंकराची पूजाही करूं लागली. (स्त्रियांनी आपल्या मर्जीने कोणतेच व्रतवैकल्यादि करूं नयेत; पतीच्या आज्ञनेच करावेत असे शास्त्रशासन आहे.)६.

**धर्मानुकूल कामसुख अनिंद्य आहे.** त्या पतिपत्नींत एकमेकांवर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणे प्रेम जडले आणि त्या भावबंधांत ते दृढ बांधले गेले. त्यांच्या वैवाहिक सुखाची परिणती अंबेने श्रेष्ठ असा गर्भ धारण करण्यांत झाली. स्त्रीपुरुषांच्या एक-दुसऱ्याच्या अवयवांच्या संयोगांतून निर्माण होणारा रतिरूप आनंद वेदांनीच प्रतिपादलेला आहे. '(जीवात्मा) आपल्या प्रज्ञेने उपस्थाच्या माध्यमांतून कामसुख आणि प्रजोत्पादन प्राप्त करून घेतो.' (कौषीतकी उ.३:६); तसेच तैत्तिरीय उपनिषदांतही 'प्रजाजनन आणि रतिक्रीडा यांना उपस्थजन्य

**सा सुदोहदलक्ष्माथ तत्त्वज्ञानमुपादिशत् । द्विजोप्यनुक्रमाच्चक्रे क्रियाः पुंसवनादिकाः ।।८।।**
**अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्व-प्रव्रज्यके सुसमयेऽथ समोष्णशीते ।**
**आत्मीयवाच्यपठनेन सतोऽनुगृह्णन्नोङ्कारवाच्यभगवान्स्वयमाविरासीत् ।।९।।**

अथ सुदोहद+लक्ष्मा सा तत्त्वज्ञानम् उपादिशत्। द्विजः अपि पुंसवनादिका क्रियाः अनुक्रमात् चक्रे।८। अ+ब्रध्न(अस्त)+ग+इष्ट+खग+सूचित+सिद्धि+पूर्व+प्रव्रज्यके सम+उष्ण+शीते सुसमये, आत्मीय+वाच्य+पठनेन सतोः अनुगृह्णन् कार+वाच्य भगवान् स्वयं आविरासीत्।९।

आनंद' अशा शब्दांत रतिसुखाला ब्रह्मानंदाचे स्वरूप मानले आहे. भगवद्गीतेनेही धर्माच्या अनुकूल कामाची भगवद् विभूतीत गणना केली आहे. अर्थातच हा काम निंद्य नाही. दधौ या शब्दांतून यथाविधी गर्भाधान या मंत्रोक्त विधीचा संकेत दिला आहे. ही सर्व भक्तपराधीन भगवंताची लीलाच होय.७.

यथाकाल तिला (अंबेला) उत्तम डोहाळे लागले. येणाऱ्या लोकांना ती तत्त्वज्ञानाचा उपदेश करूं लागली. माधवभटजींनीही क्रमशः तिसऱ्या महिन्यांत पुंसवन, अनवलोभन, चौथ्या महिन्यांत सीमंतोन्नयन (आश्वलायन गृह्यसूत्रानुसार) हे संस्कार पार पाडले. पारस्कर गृह्यसूत्रांत सीमंत सहाव्या वा आठव्या महिन्यांत सांगितले आहेत.८. ऋग्वेदाच्या *'दशमे मासि जायत'* या मंत्रानुसार दहाव्या महिन्यांत अंबा प्रसूत झाली. त्या वेळी कोणत्याही ग्रहाचा अस्त नव्हता. (**अब्रघ्नग** = अनस्तंगत) सर्व ग्रह अनुकूल होते आणि सिद्धिपूर्वक संन्यासाचा संकेत देणाऱ्या **प्रव्रज्या** नांवाच्या योगाने युक्त अशा शुभ मुहूर्तावर उष्णता आणि शीत यांचे साम्य असतांना भगवान् स्वतः, आपला वाचक जो प्रणव (ॐकार) त्याचा उच्चार करीत, कलीने त्रस्त असलेल्या साधुजनांवर अनुग्रह करण्यासाठी अवतरले. पतंजलींनी प्रणवाला ईश्वराचा वाचक असे म्हटले आहे (१:२७). कठोपनिषदानुसार (१:२:१७) ॐकार हेच परब्रह्माचे परमश्रेष्ठ आलंबन आहे. ह्या आलंबनाला जाणणारा जे इच्छील ते पावतो.

**विश्वं तदाभूच्छुभशंसि लोका ॐकारमाकर्ण्य सुविस्मिताः स्युः ।**
**भावान्सुखेटान्गणकाः सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुरदृष्टपूर्वान् ।।१०।।**

तदा विश्वं शुभ+शंसि अभूत्। लोकाः ॐकारं आकर्ण्य सुविस्मिताः स्युः। गणकाः अदृष्टपूर्वान् भावान् सुखेटान्, सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुः।१०।

ॐकार हे परात्परब्रह्मच असल्याने, तसेच ब्रह्माचे प्रतीक असल्याने आणि ब्रह्मप्राप्तीच्या सर्व उपायांत श्रेष्ठतम आलंबन (ध्येय) असल्याने भगवंत ॐकारवाच्य आहे. जशी एखादी व्यक्ती आपल्याला प्रिय अशा नांवाने हांक मारल्यानंतर आनंदित होते आणि जवळ येते तसाच परमात्माही आपल्याला प्रिय अशा ॐकाराच्या उच्चाराने प्रसन्न होऊन भक्ताकडे येतो.

**भगवदावतार.** भगवान स्वेच्छेने अवतरले (**स्वयं आविरासीत्**) म्हणजे आपल्यासारखे कर्मरूपी पारतंत्र्याने, शुभाशुभ कर्मांनुसार भौतिक देह धारण करून जन्मले नाहीत. तर श्रीकृष्णादि अवतारांच्या वेळी जसे ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य, तेज आदि ईश्वरी गुणांनी नित्य संपन्न, आपल्या त्रिगुणात्मकी वैष्णवी मायेला वश करून, जन्मादि विकारांनी अस्पृष्ट, अव्यय असा सर्वभूतमहेश्वर असूनसुद्धां, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावानेच आपल्याच मायेने देहधाऱ्यासारखा जन्मल्याचे नाटक करीत, लोकांवर अनुग्रह करण्यासाठी प्रकट झाले. तसेच या वेळी पण आपले असे कांही प्रयोजन नसतांनाही केवळ लोकोद्धारासाठीच, वैदिक धर्माचा उपदेश करण्यासाठीच नरसिंहसरस्वतीरूपाने प्रकटले. राम आणि कृष्ण यांच्या अवताराच्या वेळी जसे त्यांनी आपल्या दिव्य जन्माची सूचना देण्यासाठी आपला अलंकार, चिह्ने आणि आयुधे धारण केलेला सोळा वर्षांचा देह प्रकट केला त्याचप्रमाणे यावेळीही जन्मानंतर रडण्याऐवजी जन्मतःच ॐकाराचा पाठ केला.९.

त्या जन्मकाळी, अग्नी, वायू इत्यादि सर्व विश्व शुभाचे संकेत देत असल्याचे जाणवले. उपस्थित लोक बालकाचे ॐकारपठण ऐकून आश्चर्यचकित झाले. ज्योतिषांना बाळाच्या कुंडलीतील पूर्वी न पाहिलेले शुभ ग्रह, तनु आदि भाव आणि प्रव्रज्यादि योग पाहून परम हर्ष झाला.१०.

**त ऊचुर्माधवेदं ते सुकृतद्रुफलं किल । श्रीसिद्धयोऽस्य दास्योऽङ्घ्री स्पर्शवन्निधयोऽनुगाः ।।११।।**
**नायं गृही जनोद्धर्ता दृष्ट्या पतितपावनः । वन्द्योऽस्यानुग्रहात्कोऽपि भवेन्नैवात्र संशयः ।।१२।।**
**इत्युक्त्वा तेन हृष्टेन पूजितास्ते गृहं ययुः । श्रुत्वाद्भुतं जनुर्द्रष्टुं प्राप्तैर्लोकैः स नेक्षितः ।।१३।।**
**तद्दृग्दोषभियैकान्ते गुरुः संस्थाप्य रक्षया । तं ररक्षार्भबुद्ध्येशं तन्मायामोहितो हरिम् ।।१४।।**
**भूयान्नरो हरिरिव नरतापाघदैन्यहृत् । अयमित्याख्यया चक्रे बालं नरहरिं द्विजः।।१५।।**

ते ऊचुः, '(हे) माधव इदं किल ते सुकृत+द्रु+फलम्। अस्य श्री+सिद्धयोः दास्यः, अङ्घ्री स्पर्शवत्, निधयः अनुगाः (सन्ति)।११। अयं गृही न (अस्ति)। जन+उद्धर्ता, दृष्ट्या पतित पावनः अस्ति। अस्य अनुग्रहात् कः अपि वन्द्यः भवेत्। अत्र न एव संशयः।'१२। इति उक्त्वा हृष्टेन तेन पूजिताः ते (गणकाः) गृहं ययुः। (इदं) अद्भुतं जनुं श्रुत्वा द्रष्टुं प्राप्तैः लोकैः स न ईक्षितः।१३। तत्+माया+मोहितः गुरुः तत्+दृक्+दोष+भिया तं हरिं अर्भ+बुद्ध्या रक्षया संस्थाप्य ररक्ष।१४। अयं नरः हरिः इव नर+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात् इति (हेतोः) बालं आख्यया नरहरिं चक्रे।१५।

ते ज्योतिषी माधवाला म्हणाले, अरे माधवा, हा बालक म्हणजे खरोखर तुझ्या पुण्यवृक्षाचे फळच आहे! साक्षात् लक्ष्मी आणि सर्व सिद्धी याच्या दासी आहेत. याचे पाय परीसच आहेत. नऊ निधि यांचे अनुचर आहेत.११. हा गृहस्थ होणार नाही. लोकांचा उद्धारकर्ता होईल. आपल्या दृष्टीनेच पतितांनाही पावन करील. आपल्या अनुग्रहाने हा कुणालाही पूज्यता प्राप्त करून देईल याविषयी मुळीच संशय नाही.'१२. असे जातक ऐकून आनंदित झालेल्या माधवाने त्या ज्योतिष्यांची यथायोग्य संभावना केली आणि ते आपापल्या घरी निघून गेले. ह्या नवलाईच्या जन्माचे वृत्त ऐकून त्या बाळाला पाहायला आलेल्या लोकांना मात्र त्याला पाहतां आले नाही.१३. त्या हरीच्या मायेने मोहित झालेल्या पित्याने त्याला सामान्य बालकच समजून त्या लोकांची दृष्ट लागेल या भीतीने त्याला अंगारा लावून घरांत सुरक्षित ठेवून दिले.१४. हा मानवी बालक श्रीहरीसारखा लोकांचे ताप, पाप आणि दैन्य दूर करणारा होवो (होईल) अशा हेतूने त्याचे नांव नरहरी असे ठेवण्यांत आले.१५.

**क्षुच्छान्तिर्नास्य मत्तोऽतो धात्री वाजा पयस्विनी । मृग्येत्युक्तेऽम्बयोरोजौ स्पृष्ट्वार्भोऽध्यदुहत्पयः ॥१६॥**
**तद्बालचेष्टितं चित्रं सद्दृग्दोषभियानया । स्फुटं नाकारि मात्रैवमन्यदप्यद्भुतास्पदम् ॥१७॥**
**बाल्यादिना मर्त्यलिङ्ग-भाजीहाज्ञानलक्ष्मणाम् । प्रतीतेर्ब्रह्मतारोपः साक्षात्कैः कल्प्यते कथम् ॥१८॥**
**जातस्त्रैवार्षिकोऽप्येष लीलयाभूत्सुमूकवत् । खिन्नाऽतस्तत्प्रतीकारानारेभेऽम्बा द्विजोदितान् ॥१९॥**
**सौर्येऽह्न्यश्वत्थपत्रेऽन्न-भोजनैः कुलपार्चनैः । बालोक्तिपाठनैश्चान्यैः सूपायैर्नावदच्छिशुः ॥२०॥**

अस्य क्षुत्+शांतिः मत्तो न भवति अतो धात्री वा पयस्विनी अजा मृग्या इति अम्बया उक्ते उरोजौ स्पृष्ट्वा पयः अधि+अदुहत्।१६। तत् चित्रं बाल+चेष्टितं अनया मात्रा सत्+दृक्+दोष+भिया स्फुटं न+अकारि। एवं अन्यत् अपि अद्भुतास्पदं (स्फुटं न अकारि)।१७। इह मर्त्य+लिङ्ग+भाजि बाल्यादिना अज्ञान+लक्ष्मणाम् प्रतीतेः साक्षात् ब्रह्मता+आरोपः कैः कथं कल्प्यते?।१८। एषः त्रैवार्षिकः जाता अपि लीलया सु+मूक+वत् अभूत्। ततः खिन्ना अम्बा द्विज+उदितान् तत्+प्रतीकारान् आरेभे।१९। सौर्ये अह्नि अश्वत्थ+पत्रे अन्न+भोजनैः, कुल+प+अर्चनैः, बाल+उक्ति+पाठनैः, अन्यैः च सु+उपायैः शिशुः न अवदत्।२०।

'ह्या बाळाची भूक (माझे दूध कमी पडल्याने) माझ्याकडून शमत नाही. याच्यासाठी एखादी दुधाची आई किंवा एखादी दुभती शेळी शोधावी.' असे आपल्या आईचे बोलणे ऐकून त्या बाळाने आपल्या हातांनी तिच्या स्तनांना स्पर्श केला. त्याबरोबर तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा वाहूं लागल्या.१६. त्या लेकराने केलेला तो चमत्कार त्या मातेने साधूंचीही दृष्ट लागेल अशा भीतीने प्रकट केला नाही. त्या बाळाचे तसेच आणखीही चमत्कार तिने उघड केले नाहीत. यावरून भगवंताच्या लीला अनंत आहेत हेच सूचित केले आहे.१७. या भूलोकावर अवतरून बाल्य आदि मानवरूपाची चिह्ने धारण केलेल्या बाळाच्या अज्ञानाच्या लक्षणांचा प्रत्यय येत असतांना त्याच्याविषयी हा साक्षात् परब्रह्म आहे अशी कल्पना कुणाला कशी येऊं शकेल?१८. हा मुलगा तीन वर्षाचा होऊनही स्वेच्छेने कांहीही न बोलतां अगदी मुक्यासारखा झाला. त्यामुळे खिन्न झालेल्या आईने ब्राह्मणांना विचारून त्यावर उपाय सुरूं केले.१९. शनिवारी (किंवा रविवारी; **सौरि**=शनि; सूर्य=रवि) पिंपळाच्या पानांत अन्न वाढून जेवविण्याने, कुलस्वामीच्या पूजनाने, त्याच्याबरोबर बोबडे बोल बोलून शिकवल्याने आणि ब्राह्मीवचाचे सेवन आदि अशाच दुसऱ्या प्रभावी उपायांनीसुद्धां तो शिशु कांही बोललाच नाही.२०.

**वक्तुं श्रोतुं नायमज्ञो मूकश्चेत्कथमोङ्कृतिम् । श्रुत्वान्योक्तिं ब्रूत इति पितरौ मोहमापतुः ।।२१।।**
**मूकोऽयं नौ श्रमेणालं प्रदोषे शम्भुरर्चितः । दिष्ट्यैतत्फलं प्राप्तं संस्कार्योऽसौ कथं न्वतः ।।२२।।**
**ताभ्यामित्युदिते मौञ्ज्यां बद्धायां वक्ष्य इत्यसौ । संज्ञया दर्शयत्स्वर्णं व्यकृणोत्तन्मुदेऽयसः ।।२३।।**
**तदा सञ्जातविश्वासो विप्रानाहूय माधवः । मुदा संभृतसंभारः सुलग्नेऽमुमुपानयत् ।।२४।।**

अयम् वक्तुं श्रोतुं च न अज्ञः। मूक इति चेत् अन्य+उक्तिं श्रुत्वा कथं ॐ कृतिं ब्रूते? इति पितरौ मोहं आपतुः।२१। अयं मूकः (अस्ति)। नौ श्रमेण अलम्। प्रदोषे शम्भुः अर्चितः तत् एतत् दिष्ट्या फलं प्राप्तम्। नु अतः असौ कथं न संस्कार्यः?।२२। ताभ्यां इति उदिते असौ मौञ्जायां बद्धायां वक्ष्ये इति संज्ञया दर्शयत्। तत्+मुदे अयसः स्वर्णं व्यकृणोत्।२३। तदा सञ्जात+विश्वासः माधवः मुदा संभृत+संभारः विप्रान् आहूय सुलग्ने अमुम् उपानयत्।२४।

याला ऐकायला किंवा बोलायला येत नाही असे नाही. मुका म्हणावा तर इतरांचे बालणे ऐकून हा 'ॐ' असे उत्तर कसे देतो? असा त्याच्या मातापित्यांना संभ्रम पडला.२१. ते म्हणाले, 'इतके उपाय करूनही हा कांहीच बोलत नाही त्या अर्थी हा मुकाच असावा. प्रदोषकाळी शंकराची पूजा केल्याचे हे चांगले पुत्ररूप फळ आम्हांला मिळाले! तो दुर्दैवाने मुका मिघाला. तरी आतां त्याच्यावर मौंजीबंधनादि संस्कार न करून कसे चालेल?'२२. आपल्या आईवडिलांचे हे संभाषण ऐकून ह्या मुलाने त्यांना खुणेने दाखविले कीं, 'मी मौञ्जीबंधनानंतर बोलेन.' त्यांची खात्री पटविण्यासाठी त्यानें आपल्या हस्तस्पर्शानिच परीसाप्रमाणे लोखंडाचे सोने करून दाखविले. विधिवत् संस्कारून स्वस्तिवाचन केल्यावर बटूने मातृभोजन केले. २३. त्या वेळी माधवाचा विश्वास बसला आणि त्याने आनंदाने सर्व सामग्री जमवून शुभ मुहूर्तावर ब्राह्मणांना बोलावून ह्या आपल्या पुत्राची मुंज लावली. मुंज अर्थात् उपनयन म्हणजे आचार्यांजवळ नेणे हे अंगभूत असलेले आणि गायत्रीचा उपदेश प्रधान असलेले विशेष कर्म. उपनयन हे पद योगरूढ आहे. २४.

**सुसंस्कृतः कृतस्वस्त्ययनो भुक्तोऽम्बया सह । गुरूपदिष्टां सावित्रीमुपनीतोऽयमाददे ।।२५।।**
**गुर्वाश्रितब्रह्मचारि-धर्मो भिक्षां स मातरम । याचयित्वा जगौ वेदान्न चित्रं वेदवाच्यदः ।।२६।।**
**प्रणम्य पितरौ प्राह विरक्तः प्रव्रजामि भोः । अनित्याद्द्राक्शरीरस्य तदाज्ञां दातुमर्हथः ।।२७।।**

सु+संस्कृतः कृत+स्वस्ति+अयनः अम्बया सह भुक्तः उपनीतः गुरु+उपदिष्टां सावित्रीं आददे।२५। गुरु+आश्रित+ब्रह्मचारि+धर्मः सः मातरम् भिक्षां याचयित्वा वेदान् जगौ। (इदं) न चित्रं, अदः वेदवाचि।२६। पितरो प्रणम्य (सः) प्राह भोः! अहं विरक्तः शरीरस्य अनित्यत्वात् द्राक् प्रव्रजामि। तत् (युवां) आज्ञां दातुं अर्हथः।२७।

त्यानंतर मुंज लावून - द्वितीय जन्माचे द्योतक असलेली वस्त्र आणि जानवे घालून, गुरूंजवळ जाऊन त्यांनी कानांत उपदेशिलेला उपदेशः - अर्धा-अर्धा आणि संपूर्ण गायत्री मंत्र स्वीकारून उच्चारला.२५. 'तूं आतां ब्रह्मचारी आहेस, दिवसां न झोपतां आचार्यांच्या अधीन राहून वेदांचे अध्ययन करावे, सकाळ-संध्याकाळ भिक्षा मागावी, सकाळ-संध्याकाळ समिधा आणाव्यात' (आश्वलायन गृह्यसूत्र १:२२:२-५) इत्यादि ब्रह्मचारी धर्माचे गुरूंकडून श्रवण करून, आईजवळ त्याप्रमाणे भिक्षा मागितली आणि ऋक्, यजुः आणि साम या तीनही वेदांचे पठण केले. ऋग्वेदी ब्राह्मणांत वेदांचे प्रथम उपाकरण (वेदाध्ययनाचा आरंभ) उत्तरायणांत करण्याचा नियम असतो, तसा श्रीगुरूंनी अवतार घेतलेल्या वाजिसनेयि शाखेत नसतो. त्यामुळे उपनयनानंतर लगेच वेदपठण करणे योग्यच होय. नुकतीच मुंज झालेल्या, कसलाही अभ्यास न केलेल्या त्या बटूने वेदपठण केले यांत कांही आश्चर्य मानण्याचे कारणही नाही. कारण सर्व वेद ज्यांची निःश्वसिते आहेत अशा महद्भूताचा अवतार ते आहेत (बृहदारण्यक उपनिषद २:४:१०).२६. नंतर त्या बटूने माता-पित्यांना वंदन केले आणि म्हणाले, 'मी विरक्त आहे. शरीर अनित्य आहे. त्याचा क्षणाचाही भरंवसा नाही. ते पडण्यापूर्वीच ज्ञान झाले तरच मोक्ष मिळतो. अन्यथा कठोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (२:३:४) पुनश्च जन्म घ्यावा लागतो. त्यासाठी मी लगेच शास्त्राच्या आज्ञेनुसार श्रवणादींच्या अनुष्ठानासाठी संन्यास घेत आहे. तरी आपण मला आज्ञा द्यावी.'२७.

**प्रत्यवायाभिक्रमान्तो नैव धीमति धीस्त्वियम । मम प्राग्दैहिकाक्षय्या भविष्यन्त्यात्मजा हि वाम् ।।२८।।**
**इत्युक्तेऽम्बा विषीदन्ती तन्मायामोहिताऽब्रवीत् । एक एव सुतस्त्वं मे कथं यासि विहाय माम ।।२९।।**
**प्रव्रजेद्वेदविद्भुक्त-गार्हस्थ्योऽनुक्रमाद्वनात् । तत्त्वविद्वासनानाश-मनोभङ्गा अतः श्रुताः ।।३०।।**

धीमति प्रत्यवाय+अभिक्रम+अन्तौ न एव। इयं मम धीः प्राक्+दैहिका अक्षय्या। वां आत्मजा भविष्यन्ति हि।२८। इति उक्ते तत्+माया+मोहिता अम्बा विषीदन्ती अब्रवीत्। त्वं मे एक एव सुतः। मां विहाय कथं यासि?२९। वेदवित् भुक्त+गार्हस्थ्यः अनुक्रमात् वनात् प्रव्रजेत्। अतः तत्त्ववित्+वासना+नाश+ मनो+भङ्गाः श्रुताः।३०।

आपल्या गृहत्यागाच्या प्रस्तावाला आईवडिलांचा विरोध असणार याची जाणीव असलेले बाल नरहरी पुढे म्हणाले, 'ब्रह्मचर्याश्रमांत स्वाध्यायाचे अध्ययन करावे (शतपथ ब्राह्मण ११:५:३) अशी वेदांची आणि ब्राह्मणाने संपूर्ण वेदांचे सरहस्य ज्ञान करून घ्यावे शास्त्रांचीही (मनुस्मृति २:१६५) आज्ञा आहे. स्वाध्यायाचा परित्याग करून ती आज्ञा पालन न केल्याने ऋषींच्या ऋणाची फेड न केल्याचा प्रत्यवाय दोष लागेल; तसेच वैराग्याच्या अभावी हा जो संन्यासाचा अभिक्रम (आरंभ) केला आहे त्याचाही नाश होईल. (बृहदारण्यक उपनिषदाच्या भाष्यावरील वार्तिकांत १:४:१५८४ म्हटल्याप्रमाणे) कलियुगांत बहुसंख्येने आढळणाऱ्या भरकटलेल्या, भांडकुदळ, दुश्चित्त, परनिंदापर संन्याशांत भर पडेल; असे तुम्हांला वाटूं देऊं नका. कारण मी विवेकशील बुद्धीने हा निर्णय घेत आहे. ही बुद्धी माझी पूर्वजन्मार्जित आणि अक्षय आहे. मी संन्यास घेतल्यावर तुमची गती काय असें विचाराल तर तुम्हांला आणखी पुत्र होणार आहेत.'२८. असे आपल्या मुलाचे भाषण ऐकून त्याच्याच मायेने भुललेली आई दुःखाने कळवळून म्हणाली. 'अरे, तूं माझा एकुलता एक मुलगा आहेस. असा कसा मला सोडून जातोस?२९. आधी ब्रह्मचर्याश्रमांत वेदांचा अभ्यास करावा, मग गृहस्थाश्रमांतील सुखांचा उपभोग घेऊन वानप्रस्थ आश्रम घ्यावा आणि मग संन्यास घेऊन तत्त्वज्ञान, वासनाक्षय आणि मनोभंग साधावेत असाच क्रम आमच्या ऐकण्यात आहे. किंवा असाच क्रम श्रुतिसंमत आहे.'३०.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**जैह्व्यौपस्थ्यसुखाक्तानां क्रमोऽयं नैव मादृशः । प्राक्संस्कारविरक्तस्य जोष्यैः किं मेऽकयोनिभिः ।।३१।।**
**श्रुतश्रोतव्यनिर्वेदं यास्ये संन्यस्य भो ततः । संसिद्धिः सुलभा नातः परं कार्यं हि धीमता ।।३२।।**
**कलावायुः शतं स्वापाद्-ध्रियतेऽर्धं तु शेषकम् । बाल्ययौवनवृद्धत्वैः पराधीनतया च नुः ।।३३।।**

श्रीगुरुः उवाच। जैह्व्य+औपस्थ्य+सुखाक्तानां अयं क्रमः। मादृशः न एव। प्राक्+संस्कार+विरक्तस्य मे अक+योनिभिः जोष्यैः किम्?३१। भो, संन्यस्य श्रुत+श्रोतव्य+निर्वेदं यास्ये। ततः सिद्धिः सुलभा हि अतः परं धीमता न कार्यम्।३२। कलौ नुः आयुः शतम्। अर्धं स्वापात् ऱ्हियते। शेषकं (अर्धं) तु बाल्य+यौवन+वृद्धत्वैः पराधीनतया (ऱ्हियते)।३३।

यावर श्रीगुरू उत्तर देत आहेत. 'जिह्वेने मिळणारा रसास्वाद आणि लिंगाने मिळणारे कामसुख (हे सर्वच ऐंद्रिय सुखांचे उपलक्षण आहे) यांची आसक्ती असणाऱ्यांसाठी हा तूं सांगितलेला क्रम आहे. माझ्यासारख्यासाठी नाही. पूर्वसंस्कारांमुळे विरक्त असलेल्या मला या दुःखमूलक विषयांचे काय प्रयोजन? या विषयांच्या उपभोगाच्या काळांतही स्पर्धा, असूयादि उपसर्ग असतातच. विवेकशील माणसाला सगळाच संसार दुःखरूपच आहे असे पतंजलींचे सूत्र आहे (*'सर्वमेव दुःखं विवेकिनाम्।'* २:१५) म्हणून संन्यास घेऊन ज्ञात आणि अज्ञात अशा सर्व अग्राह्य विषयांपासून मन काढून मी जात आहे. निर्वेद म्हणजे दुःखबुद्धीने विषयांसंबंधी उदासीनता. अशा रीतीने संन्यास घेतल्यावर मनुष्यजन्माचे परमसाध्य जो मोक्ष तो सुलभ होतो. म्हणून शहाण्याने यापेक्षां वेगळे कांही करूं नये.३२. 'कलियुगांत माणसाची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची सांगितली आहे. त्यांतील अर्धी झोपेतच जाते. उरलेल्या अर्ध्या भागांत बालपण, यौवन आणि वार्धक्य यांच्यांत अनुक्रमे मातापिता, पत्नी आणि पुत्रपौत्र (दुहिता-दौहित्र) यांच्या अधीनतेत जाते (*'पितृमातृमयो बाल्ये यौवने वनितामयः। पुत्रपौत्रमयो वार्द्धक्ये मूढो नात्ममयः क्वचित्।।'* गरुडपुराण-प्रेतखंड-धर्मकांड १२:१९).३३.

**स्वप्नवत्सम्पदिष्टाढ्य-संसारोऽज्ञानकल्पितः । यौवनं पुष्प वच्चायुस्तडिद्वत् क्व धृतिर्बुधे ।।३४।।**
**कालो भ्रूणाञ्छिशून्यूनो वृद्धानार्तान्सुखस्थितान् । मूढान् ग्रसत्यपि प्राज्ञान्निःशेषानमरानपि ।।३५।।**
**यदर्थं ममताप्येतज्जलबुद्बुदवद्वपुः । मांसास्थिरक्तवद्धिंस्र-वञ्चनार्थं त्वगावृतम् ।।३६।।**

अज्ञानकल्पितः सम्पत्+इष्ट+आढ्य+संसारः स्वप्नवत् (अस्ति)। यौवनं पुष्पवत्; आयुः तडित्+वत्। बुधे क्व धृतिः?३४। कालः भ्रूणान्, शिशून्, यूनः, वृद्धान्, आर्तान्, सुखस्थितान्, मूढान्, प्राज्ञान् अपि निःशेषान् अमरान् अपि ग्रसति।३५। यदर्थं ममता (क्रियते) एतत् अपि वपुः जल+बुद्बुदवत्। मांस+अस्थि+रक्त+वत् हिंस्र+वंचनार्थं त्वक्+आवृतम्।३६।

अज्ञानाने भासणारा हा संपत्ती, आप्त, इष्ट इत्यादींनी युक्त असा संसार स्वप्नासारखा मिथ्या आहे. यौवन हे फुलासारखे लगेच कोमेजणारे आहे. आकाशांत चमकून जाणाऱ्या विजेसारखे हे आयुष्य क्षणभंगुर आहे. शहाण्याने यांतील कशाचा भरंवसा धरावा? हे मानवी जीवन बिनभरंवशाचे आहे असा भावार्थ.३४. इथे काळ (मृत्यू) गर्भांतल्या भ्रूणापासून सर्वांच्या मागे लागलेला आहे. बाल, तरुण, वृद्ध, दुःखी, सुखी, मूर्ख, शहाणा या सर्वांचा, अगदी देवांचाही तो ग्रास करतोच. कुणालाही सोडत नाही.३५.

**नाशिवंत देह -** ज्या देहामुळे सर्व 'माझे' वाटतात तो देहसुद्धां पाण्यावरील बुडबुड्यासारखा अशाश्वत आहे. मांस, अस्थी, रक्त अशा घृणास्पद पदार्थांचा बनलेला आणि लांडगे, कोल्हे, कावळे अशा हिंस्र प्राण्यांपासून रक्षण करण्यासाठी कातडीत गुंडाळलेला आहे. शतश्लोकींत (४) भ.पू.पा. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे बाहेरून हाडे, स्नायू, मज्जा, मांस, रक्त, चरबी आणि त्वचा यांनी घडलेला आणि आंत विष्ठा, मूत्र आणि श्लेष्म यांनी भरलेला असा हा किळसवाणा देह धारण करण्याइतके वैराग्याला प्रभावी निमित्त शोधून सांपडणार नाही.३६.

**न भस्मविट्कीटरूप-परिणामं निजानुगम् । तदानुषङ्गिकाः स्त्र्याद्याः किमुतानर्थहेतवः ।।३७।।**

भस्म+विट्+कीट+रूप+परिणामं (वपुः) न निज+अनुगम्। तत्+आनुषंगिकाः अनर्थ+हेतवाः स्त्री+आद्याः किम् उत?३७।
गरुडपुराणाच्या वचनानुसार (प्रेतखंड-धर्मकांड १९:१८) मरणोत्तर ह्या शरीराचे, पुरले तर कृमी, जाळले तर भस्म आणि हिंस्र प्राणांनी खाल्ले तर विष्ठा अशा रूपांत परिवर्तन होते. हे कांही आपल्याबरोबर लोकांतरी किंवा जन्मांतरी येत नाही. गरुडपुराणांतच (प्रेतखंड-धर्मकांड १२:२४-२७) पुढे असे म्हटले आहे की जीवाने शरीर सोडल्यानंतर ते भूमीवर दगडा-लाकडासारखे अचेतन होऊन तिथेच पडते; हा जीव आपण केलेले शुभाशुभ कर्म तेवढे बरोबर घेऊन जातो. मित्र आणि भाऊबंद स्मशानापर्यंत येऊन परत जातात आणि शरीराला अग्नी जाळून टाकतो. जाणाऱ्या जीवासोबत फक्त त्याने केलेले पाप-पुण्यच जाते. ही जर देहाची कथा आहे तर देहाच्या अनुषंगाने आपले वाटणाऱ्या, अनर्थालाच कारण असणाऱ्या स्त्रीपुत्रादीविषयी बोलायलाच नको!३७.

**देह आणि जीव -** हा देह पंचभूतांचा घडलेला, विकारशील (जन्म, वाढ, अस्तित्व, परिणाम, क्षय आणि नाश हे विकार असलेला) आणि इंद्रियांना प्रतीत होणारा - म्हणजेच घटासारखा जड आहे. जीव हा गीतेच्या वचनानुसार (१५:१७) चैतन्याचा अंश आहे; अविनाशी आहे; तो आकाशासारखा सर्वव्यापी आहे; आकाश जसे घट-मठादि उपाधींनी बंदिस्त झाल्यासारखे भासते पण तसे नसते, तसाच देहादि उपाधींनी बद्ध वाटणारा जीव वस्तुतः तसा नसतो. कठोपनिषदाच्या वचनानुसार (१:२:१८) जन्मादिविकाररहित आहे. मग तो संसारांत पडून सुखदुःखांचा भोग कसा घेतो, असे कुणी म्हणेल, तर त्याचे उत्तर असे आहे की त्याचा सुखदुःखाशी जाणवणारा संबंध अज्ञानमूलक आणि स्वप्नवत् आहे. 'तु' शब्दातून छांदोग्य उपनिषदांतील (६:३:२) जीवरूपाने प्राणिमात्रांत प्रवेशून नामरूपांची अभिव्यक्ती करण्याच्या ईश्वरी संकल्पाचा संकेत आहे. आतां अशी शंका उपस्थित होते की सर्वज्ञ ईश्वर जाणूनबुजून लक्षावधी अनर्थांचे मूळ असलेल्या देहांत प्रवेश करून दुःख भोगण्याचा संकल्प कसा करील?

**देहोऽचित्सर्वगो जीवश्चिदंशोऽजोऽव्ययो ध्रुवः । स्वप्नवत्सुखदुःखादि-संबन्धोऽज्ञानजोऽस्य तु ।।३८।।**

देहः अचित्। चिदंशः जीवः अजः अव्ययः। अस्य सुख+दुःख+आदि संबंधः तु अज्ञान+जः स्वप्न+वत्।३८।

शंका बरोबर आहे. आपल्या अविकृत रूपाने अनुप्रवेश करून दुःख भोगीन असा ईश्वराचा संकल्प नाही. जीव हा बुद्धी, मन, प्राण, इंद्रिये इत्यादि उपाधींत पडलेले केवळ ईश्वराचे प्रतिबंब आहे. आरशांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासारखे. अचिंत्य अनंतशक्तिमान आत्म्याचा बुद्ध्यादिकांत होणारा फक्त आभास आहे. आत्मस्वरूपाचा विवेक न केल्याने तो सुखी, दुःखी, मूढ इत्यादि भासतो. जसे आरशांत पडलेले माणसाचे किंवा पाण्यांत पडलेले सूर्याचे प्रतिबिंब आरशावरील मळाने मळल्यासारखे वाटते, आरशावरील तड्याने फुटल्यासारखे दिसते किंवा पाण्याच्या हलण्यामुळे विकृत झालेले दिसते तसेच हे आहे. मूळ बिंब - माणूस किंवा सूर्य, यांच्यावर त्याचा कांहीच परिणाम होत नाही. कठोपनिषदाच्या (२:२:११) प्रतिपादनानुसार सर्व जगाचा नेत्र असलेला सूर्य जसा त्या जगांतील दोषांनी दूषित होत नाही त्याचप्रमाणे भूतमात्रांचा अंतर्यामी बाह्य जगतांतील दुःखांपासून अलिप्त असतो. बृहदारण्यक उपनिषदांत (१:३:७) म्हटलेच आहे की हा आत्मा चिंतन करीत असल्यासारखा किंवा हालचाल करीत असल्यासारखा दिसतो. वस्तुतः चिंतन वा हालचाल हे त्याचे गुण नसतात.

**जीवाचे सत्यत्व -** मृत्तिकेची बाहुली, मृत्तिकेचा घट, मृत्तिकेचे पात्र या सर्वांत मृत्तिका हेच सत्य आहे. घट, पात्र, बाहुली इत्यादि मृत्तिकेचेच विकार आहेत. त्या विकारांना शब्दांत व्यक्त करण्यासाठी नांवे दिलेली आहेत (छांदोग्य उपनिषद ६:१:४). त्याचप्रमाणे आत्माच सत्य आहे आणि सर्व जीव हे विकार आहेत असे मानले तर मग सगळे जीव लटकेच म्हणावे लागतील आणि इहलोक, परलोक इत्यादीसुद्धां खोटे ठरतील. हा आक्षेप बरोबर नाही; कारण आत्मा सत्य आहे आणि त्याच्या अधिष्ठानामुळे जीवादि विकारांनाही सत्यत्व येते. आत्म्याचे अधिष्ठान नसेल तर ते आपल्या ठिकाणी असत्यच आहेत. सद्रूप आत्म्यामुळे सर्व व्यवहारांना सर्व विकारांना सत्यत्व आहे. अन्यथा ते खोटेच आहेत. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांच्या छांदोग्य उपनिषदाच्या ६:३:२ या मंत्रावरील भाष्याचा आधार घेतला आहे.३८.

**प्रसादात्सद्गुरोः शाब्द-परब्रह्मविदस्त्विदम् । छित्त्वाऽविद्गहनं ज्ञेय-ज्ञानास्त्रः स्वस्थ इद्भवेत् ।।३९।।**
**य उत्तमं ज्ञानपात्रं लब्ध्वा धामाग्रजातिजम् । नाचरत्यात्मनः श्रेयस्तेनात्मा वञ्चितो ध्रुवम् ।।४०।।**
**तस्मान्नारब्धविघ्ना मे भव तेऽम्ब नमोऽपि ते । पुत्रो भविष्यति ध्यानाद् भवाब्धिं मे तरिष्यसि ।।४१।।**

शाब्द+परब्रह्म+विदः सद्गुरोः प्रसादात् ज्ञेय+ज्ञान+अस्त्रः इत् इदं तु अवित्+गहनं छित्त्वा स्वस्थः भवेत्।३९। यः उत्तमं ज्ञान+पात्रं अग्र+जातिजं धाम लब्ध्वा आत्मनः श्रेयं न आचरति, तेन आत्मा ध्रुवं वंचितम्।४०। हे अम्ब! तस्मात् मे आरब्ध+विघ्ना न भव। ते नमः। अपि ते पुत्रो भविष्यति। मे ध्यानात् भवं तरिष्यसि।४१।

**सद्गुरूंची आवश्यकता -** जीवाचा सुखदुःखाशी असलेला संबंध अज्ञानजन्य आहे तर मग ह्या अज्ञानाचा परिहार कशाने होईल ज्यायोगे पुरुष कृतार्थ होतो? आत्म्याविषयीचे औपनिषद शब्दज्ञान तसेच परब्रह्माशी एकरूप होऊन झालेले विज्ञान ज्याला झाले आहे अशा म्हणजे श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंच्या प्रसादाने म्हणजेच श्रवणादि उपदेशाने हे अज्ञान दूर होते. आचार्यवान् म्हणजे गुरू असलेल्या पुरुषाला ज्ञान होते असे छांदोग्य उपनिषदाचे (६:१४:२) प्रतिपादन आहे. यावर कुणी असे म्हणेल की पद, वाक्य, प्रमाण यांचे ज्ञान असलेला कुणीही हे उपनिषदांतील शब्दज्ञान स्वतःच्या विचाराने प्राप्त करूं शकतो. तिथे सद्गुरूंचे काय प्रयोजन? याचे कारण असे आहे की हातांत समिधा धारण करून श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जाऊन ज्ञान मिळविण्याचाच, वेदांनी उपदेश (मुंडक उ. १:२:१२) केला आहे. छांदोग्यांतील (६:१४:२) दृष्टांताप्रमाणे गंधार देशाचा रहिवासी चोरांनी डोळ्यांवर पट्टी लावून बांधून ठेवल्यांने विवेकहीन आणि दिङ्मूढ होतो; तहानभुकेने व्याकुळ होतो; अरण्यांतील हिंस्र पशु, वाटमारे इत्यादि अनेक अनर्थांच्या भीतीने अर्धमेला होतो. त्यां वेळी त्याला स्वतःला आक्रोशाशिवाय कांहीच करतां येत नाही. असा तो दुःखार्त आणि अगतिक 'कुणी तरी येऊन आपली यांतून सुटका करावी' अशी तळमळ करीत उभा असतो. अशा वेळी कुणी तरी दयाळू माणूस येऊन त्याला बंधनांतून सोडवून त्याचे डोळे उघडतो. मग त्यानं सांगितलेल्या गंधार देशाच्या वाटेने जाऊन आपल्या घरी जाऊन सुटकेचा निःश्वास टाकून सुखी होते.

**इत्युक्त्वाऽदर्शयत्तस्यै स्वं रूपं दिव्यमुत्तमम् । साप्यदभ्रदृशा दृष्ट्वा तद्वित्तत्प्राग्जनिर्जगौ ।।४२।।**
**नमस्ते भगवन्देव प्राग्दृष्टो मर्तुकामया । कुपुत्रया मया स त्वं श्रीपादो मेऽद्य गोचरः ।।४३।।**

इति उक्त्वा तस्यै स्वं दिव्यं उत्तमं रूपं अदर्शयत्। सा अपि अदभ्र+दृशा दृष्ट्वा तत्+वित् तत्+प्राक्+जनिः जगौ।४२। (हे) देव! भगवन्! नमस्ते! प्राक् मया कुपुत्रया मर्तुकामया दृष्टः (यः) श्रीपादः सः त्वं अद्य मे गोचरः।४३।

त्याचप्रमाणे सच्चिदानंद जगदात्मनाच्या आपल्या नित्य स्वरूपापासून भ्रष्ट झालेला हा जीवात्मा आकाश, तेज आदि महाभूतांपासून झालेल्या आणि वात, पित्त, कफ, रक्त, मांस, रुधिर, मेद, मज्जा, शुक्र, कृमी, मल-मूत्र यांनी व्याप्त अशा या देहरूपी अरण्यांत शीत-ऊष्ण अशा अनेक द्वंद्वांच्या दुःखांनी गांजलेला, विवेकरूपी डोळ्यांवर मोह नांवाची पट्टी बंधल्याने अंध झालेला, पत्नी, पुत्र, बंधू, पशू अशा अनेक विषयांच्या तृष्णारूपी पाशाने बद्ध असलेला, पापपुण्यरूपी चोरांच्या तावडीत सांपडून, 'मी हा अमुक', 'हे माझे पुत्र', 'हे माझे बांधव', 'मी सुखी आहे', 'मी दुःखी आहे', 'मी मूर्ख', 'मी पंडित', 'मी जन्मलो', 'मी मेलो', 'मी म्हातारा', 'मी पापी', 'माझा मुलगा मेला', 'माझे धन गेले', 'माझा घात झाला', 'आतां मी कसा जगूं?', 'माझी काय गती?', 'मला कोण वांचवील?' अशा सहस्रावधी अनर्थांच्या जाळ्यांत सांपडलेल्या जीवाला कांही पूर्वपुण्याईमुळे, परमकृपाळू, शब्दज्ञानाने व्युत्पन्न आणि परब्रह्माच्या साक्षात्कारी जीवन्मुक्त सद्गुरूंची भेट होते. त्यांनी परमकारुण्याने संसारांतील दोष दाखवून दिल्याने तो पुरुष विरक्त होतो. मग ते दयाघन सद्गुरु त्याला 'तूं अमका, पुत्रादि युक्त संसारी नाहीस तर ते (ब्रह्म) तूं आहेस' असा उपदेश करून अविद्यारूपी मोहाची पट्टी सोडून त्याचे विवेकरूपी नेत्र उघडतात. त्यासाठी गीतेत निरूपिलेले जे **ज्ञेय** (१३:१२) अनादिमान् परब्रह्म आणि त्याच्या प्राप्तीची अमानित्वादि अठरा **ज्ञान**साधने ही **अस्त्रे** त्याला सद्गुरूंकडूनच मिळतात. त्यांनी गाढ अविद्येचा छेद करून तो स्वस्थ- आत्मस्वरूपांत स्थिर, होतो.३९. जो हा आत्मज्ञानाला योग्य असा ब्राह्मण देह मिळूनही आत्मकल्याणाचे साधन करीत नाही तो स्वतःची मोठीच फसवणूक करून घेतो.४०.

**ब्रह्मापि वेत्ति नो रूप-गुणांस्तु मोहिता त्वहम् । मानुषी त्वां कथं जाने दिष्ट्याद्य ज्ञानमर्पितम् ।।४४।।**
**कृतं मत्कुक्षिसंभूत इति लोकविडम्बनम् । अज ब्रह्माण्डकुक्षे न उभयं पावितं कुलम् ।।४५।।**

(तव) रूप+गुणान् तु ब्रह्मा+अपि नो वेत्ति। अहं तु मोहिता मानुषी त्वां कथं जाने? दिष्ट्या अद्य ज्ञानं अर्पितम्।४४। (हे) अज! ब्रह्मांडकुक्षे! मत्+कुक्षि+संभूत इति लोक+विडंबनं कृतम्। नः उभयं कुलं पावितम्।४५।

आई! तेवढ्यासाठी माझ्या ह्या उपक्रमाला अडसर होऊं नकोस. मी तुला नमस्कार करतो. आणि तुला आणखी मुलगा होईल. तसेच माझ्या ध्यानाने तूं हा भवसागर तरून जाशील.४१. असे बोलून श्रीगुरूंनी तिला (मातेला) आपले दिव्य परमश्रेष्ठ रूप दाखविले. तीसुद्धां ते रूप जाणून - पूर्वजन्मी आपल्याला वर देणाऱ्या भगवान श्रीपादवल्लभांना ओळखून म्हणाली.४२. 'देवा, भगवंता! आपल्याला नमस्कार असो.४३. पूर्वजन्मी मी मूढ पुत्राच्या दुःखाने त्रासून आत्महत्या करीत असतांना मला दर्शन देणारे श्रीपादच आपण आज मला आपल्या दर्शनाने कृतार्थ करीत आहांत. मी असा आहे हे तुला आधीपासूनच (माझ्या जन्मापासूनच) कसे कळाले नाही? असे विचारशील तर तुझे रूप आणि गुण साक्षात् ब्रह्मदेवालाही कळत नाहीत. मी तर तुझ्या मायेने मोहित झालेली एक सामान्य स्त्री आहे. माझ्या परमभाग्याने आज मला हे (तुझ्या रूपगुणांचे) ज्ञान अर्पण केले आहेस.४४.' 'असा जर मी आहे तर तुझा मुलगा कसा झालो?' असा प्रश्न अपेक्षून ती माता म्हणते आहे. 'हे जन्म-मरणादिविकारांच्या अतीत असणाऱ्या आणि असंख्य ब्रह्मांडे आपल्या कुशींत धारण करणाऱ्या देवा! माझ्या कुशीतून जन्म घेण्याचे हे आपण लोकांना दाखविलेले एक नाटक मात्र आहे. ह्यामुळे आमची उभय कुळे पावन झाली आहेत.'४५.

**सत्यसङ्कल्प ते विघ्नं माऽस्तु रूपं स्थिरीकुरु । मयीदं चात्र भो स्थेयं यावत्पुत्रो भविष्यति ।।४६।।**
**तथेत्युक्त्वेशबुद्ध्याऽसौ स्थित्वा ताभ्यां सुपूजितः । तत्र शिक्षितवाञ्छिष्यान्विदुषोऽप्येष वेदवाक् ।।४७।।**
**अम्बापि गर्भिणी भूत्वा कालेऽसूत सुतौ शुभौ । स त्रैमासिकयोः शिश्वोः प्राहाम्बां शृणु मेऽम्ब भोः ।।४८।।**
**जातौ द्वौ ते भविष्यन्ति पुत्रौ पुत्री च सत्तमाः । देह्याज्ञां म इति प्रोक्त्वा तदाज्ञप्तः प्रचक्रमे ।।४९।।**

भो सत्यसङ्कल्प, ते विघ्नं मा अस्तु। मयि इदं रूपं स्थिरीकुरु। च यावत् पुत्रो भविष्यति अत्र स्थेयम्'।४६। तथा इत् उक्त्वा असौ तत्र स्थित्वा, ताभ्यां ईश+बुद्ध्या सुपूजितः, एष वेद+वाक् विदुषः अपि शिष्यान् शिक्षितवान्।४७। अम्बा अपि गर्भिणी भूत्वा काले शुभौ सुतौ असूत। शिश्वोः त्रै+मासिकयोः (सतोः) सः अम्बां प्राह। भोः मे अम्ब, शृणु।४८। (अधुना) ते द्वौ (पुत्रौ) जातौ। (परं) सत्तमाः पुत्रौ पुत्री च भविष्यन्ति। मे (गन्तुं) आज्ञां देही। इति प्रोक्त्वा तत्+आज्ञप्तः प्रचक्रमे।४९।

आपण आपला संकल्प खरा करणारे आहांत, आपल्या उपक्रमाला मी विघ्न करीत नाही. माझ्या चित्तांत हे आपले रूप स्थिर व्हावे तसेच आम्हांला पुत्र होईपर्यंत आपण इथेच राहावे अशी माझी प्रार्थना आहे.४६. मातेच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरु तिथे राहिले. त्यांच्या मातापित्यांनी त्यांचे ईश्वरबुद्धीने उत्तम प्रकारे पूजन केले. तसेच वेद हेच ज्याची वाणी आहेत अशा श्रीगुरूंजवळ अनेक विद्वान् शिष्यसुद्धां शिकूं लागले. पद, वाक्य, प्रमाणांनी उत्पन्न होणाऱ्या संशयरहित ज्ञानाचा त्यांना श्रीगुरूंनी उपदेश केला.४७. अम्बेनेही यथाकाल गर्भ धारण करून दोन छानशा मुलांना जन्म दिला. ती जुळी बाळे तीन महिन्यांची झाली असतां त्या श्रीगुरूंनी आईला बोलावून म्हटले, हे माझे आई, ऐक!४८. आतां तुला दोन पुत्र झाले आहेत. पुढे अगदी उत्तम असे आणखी दोन पुत्र आणि एक मुलगी तुला होतील. तरी आतां मला जाण्याची आज्ञा दे. असे बोलून आणि आणि मातेचा निरोप घेऊन श्रीगुरू घरांतून जायला निघाले.४९.

**रेजे शिरस्त्राणविशोभिमूर्धा सुपादुकामण्डितपादपद्मः ।**
**काषायवस्त्रावृतपेशलाङ्गः कौपीनधृग्दण्डकरः स्मितास्यः ।।५०।।**
**क्षमस्वार्भबुद्ध्या मयाजापराद्धमिति व्याहरन्तीं सतीं त्रिंशताब्दैः ।**
**पुनर्दर्शनं मेऽस्तु सांनिध्यमम्ब स्मृतावित्थमुक्त्वा ययौ तां निवर्त्य ।।५१।।**
**नायं मर्त्योऽस्तीश एनं नताः स्म एवं सद्भिः स्तूयमानो मुनीनः।**
**योगीशोऽपि द्राग्बदर्याश्रमं सद् द्रष्टुं काशीं प्राप वेषान्मुमुक्षोः ।।५२।।**

शिरः+त्राण+विशोभि+मूर्धा सुपादुका+मंडित+पाद+पद्मः काषाय+वस्त्र+आवृत+पेशल+अंगः कौपीन+धृक्+दण्ड+करः स्मित+आस्यः रेजे।५०। (हे) अज! मया अर्भ+बुद्ध्या अपराद्धं क्षमस्व! इति व्याहरन्तीं सतीं, (हे) अम्ब, त्रिंशत+अब्दैः मे पुन+दर्शनं अस्तु। स्मृतौ मे सान्निध्यं अस्तु। इत्थं उक्त्वा तां(तान्) निवर्त्य ययौ।५१। अयं मर्त्यः न (किंतु) ईशःअस्ति। एनं नताः स्म। एवं सद्भिः स्तूयमानः मुनीनः योगीशः अपि बदरि+आश्रमं द्रष्टुं मुमुक्षु+वेषेण काशीं प्राप।५२।

त्या वेळी जगदुद्धारासाठी घराबाहेर पडणाऱ्या त्या श्रीगुरूंच्या बालमूर्तीचे ध्यान या श्लोकांत दिले आहे. शिरस्त्राणाने मढवलेला चेहरा, छानशा पादुकांनी सजवलेली पदकमले, भगव्या वस्त्राने आच्छादलेली कोमल काया, कांसेला लंगोटी, चिमुकल्या हातांत दंड आणि स्मिताने विकसलेले तेजस्वी मुखकमल असे ते श्रीगुरू शोभत होते.५०. 'जन्मादि देहधर्मातीत परमेश्वरा! मी बालबुद्धीने (अजाणतेपणाने किंवा तुला सामान्य बालक समजून) जे अपराध केले आहेत - तुला अडवले, बांधले, खाण्यापिण्यांत हेळसांड केली, कडेवर घेतले नाही किंवा वेळींच धुतले-पुसले नाही, त्यांची मला क्षमा कर!' अशी काकळूत करणाऱ्या त्या साध्वीला, 'तीस वर्षांनी तुला पुन्हा भेटेन, तूं स्मरण करतांच तुझ्या चित्तांत प्रकटेन' असे आश्वासन देत तिला (आणि बरोबरच्या इतरही मंडळींना) निरवून श्रीगुरूंनी प्रयाण केले.५१. त्या वेळी सर्व साधुसज्जन म्हणूं लागले, 'हा बालक खरोखर मर्त्य मानव नाही तर साक्षात् ईश्वरच आहे. आपण ह्याला नमस्कार करूं या.' अशा प्रकारची वाखाणणी स्वीकारत, मुनिश्रेष्ठ योगीश्वर असूनही मुमुक्षूच्या वेषाने बदरिकाश्रमाच्या वाटेवर काशीला येऊन थांबले.५२.

**स खेचरत्सहृज्जिह्व उन्मन्यावस्थयाऽतपत् । तपः श्वासोच्छ्वासहीनः काश्यां वज्रासनस्थितः ।।५३।।**
**भागीरथ्यां त्रिषवणमथाप्लुत्य साष्टाङ्गयोगं युञ्जन्तं तं सकलमुनयः प्रेक्ष्य सिद्धासनस्थम् ।**
**नत्वाष्टाङ्गैः परतरधिया खेचरीमुद्रयैक-कुम्भोद्युक्तं जगुरुपरता नादसिद्धोत्समाधिम् ।।५४।।**

सः काश्यां वज्रासन+स्थितः खे+चरत्+स+हृत्+जिह्वः श्वास+उच्छ्वास+हीनः उन्मन्या अवस्थया तपः अतपत्।५३। भागीरथ्यां आप्लुत्य त्रिषवणं सिद्धासनस्थं स+अष्टांग+योगं युञ्जन्तं परतर+धिया खेचरी+मुद्रया एक+कुंभ+उद्युक्तं नाद+सिद्ध+उत्+समाधिं तं प्रेक्ष्य सकल+मुनयः उपरता परतर+धिया जगुः।५४।

काशीमध्ये वज्रासनावर (इथे त्याचा अर्थ सिद्धासन असा श्रीस्वामिमहाराजांनी केला आहे) जिह्वेसह मन आकाशांत नेणारी खेचरी मुद्रा धारण करून, श्वासोच्छ्वासरहित केवलकुंभक साधून, उन्मनी अवस्थेत खडतर तपाचे आचरण केले. तपानेच ब्रह्माला जाणावे या तैत्तरीय उपनिषदाच्या उक्तीचे (३:२) हे प्रात्यक्षिक लोकशिक्षणासाठी केले. श्रीगुरू नित्यमुक्त असल्याने त्यांना ह्या तपाचे कांहीच प्रयोजन नव्हते.५३. गंगेमध्ये त्रिकाल स्नान करून योगाच्या आठही अंगांचा अभ्यास करणाऱ्या, परमपदी बुद्धी स्थिरावणाऱ्या खेचरी (**खे** म्हणजे आकाश - सहस्रार चक्रांत जिह्वा आणि मन वि**चर**ते त्या) मुद्रेसहित, हठयोगप्रदीपिकेने सर्वश्रेष्ठ मानलेला (१:४५) केवलकुंभक साधून, अनाहतनादाच्या अनुसंधानाने सिद्ध झालेल्या उत्कृष्ट निर्विकल्प समाधीत निमग्न अशा त्या बालवयांतील श्रीगुरूंना पाहून काशीतील सर्व संन्यासी, 'हा परमेश्वरच आहे' अशा बुद्धीने त्यांच्या जवळ आदराने येऊन साष्टांग नमस्कार करून त्यांना म्हणाले.५४.

**भवान्परात्मास्ति न मर्त्यबालः सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारः ।**
**प्राक्शंकराचार्यमतोऽपि लुप्तः संन्यास एनं वितनोतु तिष्ये ।।५५।।**
**कष्टोत्थाद्यन्तवत्स्पर्श-भूभोगसुरतात्मभिः । उच्छिन्नोऽध्यात्मसौख्याज्ञैरयं कलिहतात्मभिः ।।५६।।**
**भीरूग्रे सुलभक्षेमे कलौ संन्यासवर्त्मना । अध्यात्मपरमानन्दं भगवन्दातुमर्हसि ।।५७।।**

भवान् मर्त्य+बालः न, (किन्तु) पर+आत्मा अस्ति। सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारः। प्राक् शंकराचार्य+मतः अपि संन्यासः तिष्ये लुप्तः। एनं (भवान्) तनोतु।५५। कष्ट+उत्थ+आदि+अन्त+वत्+भू+भोग+सुरत+आत्मभिः कलि+हत+आत्मभिः अध्यात्म+सौख्य+अज्ञैः अयं उच्छिन्नः।५६। (हे) भगवन्! भीरु उग्रे सुलभ+क्षेमे कलौ संन्यास+वर्त्मना अध्यात्म+परम+आनंदं दातुं अर्हसि।५७।

आपण सामान्य मानवी बालक नाहीत तर प्रत्यक्ष परमेश्वरच आहांत. साधूंच्या आणि धर्माच्या रक्षणासाठी आपण अवतार धारण केला आहे. पूर्वी शंकराचार्यांनी प्रतिष्ठित केलेला संन्यासमार्ग या कलिकाळांत सुप्तप्राय झाला आहे. त्याचा आपण प्रसार करावा. वास्तविक स्मृतिकारांनी अग्निहोत्र, यज्ञांत पशूचा बळी, संन्यास, श्राद्धांत मांसपाक, दीरापासून पुत्रोत्पत्ती या पांचांचा कलियुगांत निषेध असतांना संन्यासाच्या पुनःप्रतिष्ठेची प्रार्थना करण्याचे कारण असे आहे की स्मृतींनीच कलिकाळांतही जोंपर्यंत वेदांचे अध्ययन चालू आहे, वर्णाश्रमधर्माचे आचरण करणारे लोक आहेत तोंवर अग्निहोत्र आणि संन्यास यांचा स्वीकार करण्याची आज्ञाही स्मृतींनी केलेली आहे.५५. स्वाभाविक अशा विषयसुखांत आसक्त असलेल्यांनी या कष्टकर संन्यासाचा आश्रय कां बरे करावा? तर तो मोक्षात लाभणाऱ्या नित्य, निरुपाधिक, निरतिशय सुखासाठी! असे जर आहे तर मग तो संन्यासमार्ग लोकांनी कां टाकून दिला? याचे उत्तर या श्लोकांत दिले आहे. खरे तर इंद्रियांच्या आणि विषयांच्या संयोगापासून उद्भवणाऱ्या भोगांना आदि आणि अंत असतात. ते भोग अनित्य असतात, क्षणभंगुर असतात. तसेच ते विषयपरतंत्र असतात. हवा असलेला विषय हवा तेव्हां मिळेलच असे नसते. त्या सुखांना सीमा असते. अशा या विषयोपभोगांत रमून गेलेल्या, कलीच्या प्रभावाने बुद्धी दूषित झालेल्या आणि म्हणूनच अध्यात्मांतील स्वतंत्र, निरंतर आणि असीम सुखाची जाणीवही नसलेल्या जनसामान्यांनी ह्या संन्यासमार्गाचा उच्छेद केला आहे.५६.

**इत्याश्रुत्योक्तमाचार्यं वृत्वा कृष्णसरस्वतीम् । ततः संन्यास्यभूत्राम्ना स नृसिंहसरस्वती ।।५८।।**
**न्यस्तसूत्रशिखो रेजे न्यस्तसर्वैषणो वशी । संन्यस्ताखिलसङ्कल्पः संन्यासी निर्ममोऽद्वयः ।।५९।।**
**संन्यासपद्धतिं प्राह मुमुक्षुभ्यो जगद्गुरुः । विरजोमाञ्च्छुचिर्देवीं प्रविष्टो हापितैषणः ।।६०।।**

इति (तैः) उक्तं आश्रुत्य, कृष्णसरस्वतीं आचार्यं वृत्वा ततः स नाम्ना नृसिंहसरस्वती संन्यासी अभूत्।५८। न्यस्त+सूत्र+शिखः न्यस्त+सर्व+एषणः वशी संन्यस्त+अखिल+संकल्पः निर्ममः अद्वयः संन्यासी रेजे।५९। (ततः) जगद्गुरुः मुमुक्षुभ्यः संन्या+पद्धतिं प्राह। शुचिः विरजोमान् देवीं प्रविष्ट त्यक्त+एषणः (संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्)।६०।

भगवंता! भित्र्यांना उग्र भासणाऱ्या, पण तरी मोक्षप्राप्ती ज्या युगांत सुगम आहे अशा या कलिकाळांत संन्यासाच्या मार्गाने अध्यात्माचे परमसुखाचे दान देण्यास आपणच समर्थ आहांत.५७. अशा त्यांच्या म्हणण्याला मान देऊन श्रीगुरूंनी कृष्णसरस्वतींना गुरू करून संन्यास घेतला आणि नृसिंहसरस्वती हे नांव धारण केले.५८. केवळ नावानेच नाही तर आचरणानेही ते संन्यासी झाले. संन्यासधर्माला अनुसरून शेंडी आणि जानवे तर त्यांनी त्यागलेच, पण त्याचबरोबर दारा (पुत्र), वित्त आणि लौकिक या तीनही एषणांचाही त्याग केला; समस्त संकल्पांचाही त्याग केला; विषयांच्या त्यागाने इंद्रियांवर ताबा मिळवला; ममता आणि सुख-दुःखादि द्वंद्वांचासुद्धां त्याग करून ते संन्यासधर्माला भूषणावह झाले. कठरुद्रोपनिषदाच्या (५) वचनानुसार यज्ञोपवीत आणि वैदिक कर्मादिकांचा त्याग करून परमहंसोपनिषदांत (२) ज्याला मुख्य संन्यासी म्हटले आहे असे ते परमहंस झाले.५९. त्यानंतर जगद्गुरू श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांनी मुमुक्षूंना संन्यासधर्माचे शिक्षण द्यायला आरंभ केला. 'कुत्र्याच्या वांतीप्रमाणे सर्व - ब्रह्मलोकापर्यंत ऐहिक आणि पारलौकिक मनापासून पूर्णपणे त्यागावे; शिखा तसेच यज्ञोपवीत काढून टाकावीत; प्रायश्चित्तांनी शुद्ध व्हावे; विरजा होम करावा; गायत्रीप्रवेश करावा आणि तीनही एषणांचा त्याग करावा.' परमहंसोपनिषदाच्या (२) वचनाला अनुसरून आपल्या शरीरभोगासाठी आणि लोकोपकारासाठी लंगोटी, दण्ड आणि छाटी यांचा परिग्रह करावा. हा दंडी या शब्दाचा भावार्थ आहे. वर सांगितलेल्या मुख्य संन्यासाहून वेगळा आहे. हा विविदिषा संन्यास आहे. विद्वत् संन्यास नव्हे. अशा रीतीने विविदिषा संन्यास घेऊन सद्गुरूंना शरण जावे.६०.

**संन्यस्तसकलोऽसूत्र-चूडो दण्डी गुरुं भजेत् । प्रज्ञानं ब्रह्मायमात्मा ब्रह्म तत्त्वमसीति च ।।६१।।**
**अहं ब्रह्मास्मीति महा-वाक्यान्याप्त्वार्थतो वशी । पञ्चीकरणविल्लब्ध-संज्ञः शौची स्वधर्मवित् ।।६२।।**
**दैवभावो योगपट्टी संन्यासी श्रेयसेऽर्हति । गतिज्ञो धारणाभ्यासाज्जीवन्मुच्येत्परात्मदृक् ।।६३।।**

(संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्।) 'प्रज्ञानं ब्रह्म', 'अयमात्मा ब्रह्म', 'तत्त्वमसि' इति अहं 'ब्रह्मास्मि' इति च महावाक्यानि अर्थतो आप्त्वा, पंचीकरण+वित् लब्ध+संज्ञः शौची स्वधर्म+वित् दैवभावो, योगपट्टधारी संन्यासी श्रेयसे अर्हति। गतिज्ञो धारणा+अभ्यासात् परात्म+दृक् जीवन् मुच्येत।६१-६३।

ऋग्वेदांतर्गत (ऐतरेय उ. ३:१:३) 'प्रज्ञानच ब्रह्म' (आहे), यजुर्वेदांतर्गत 'मी ब्रह्म आहे' (बृहदारण्यक उ.१:४:१०), सामवेदांतर्गत, 'ते तू आहेस', (छांदोग्य उ. ६:८:७) आणि अथर्ववेदांतर्गत 'हा आत्मा ब्रह्म (आहे)' (मांडूक्य उ. २) ही चार महावाक्ये सद्गुरूंकडून त्यांच्या अर्थासह श्रवण करावीत.

**प्रज्ञानं ब्रह्म :-** ऐतरेय उपनिषदांत प्रथम केवळ एक ब्रह्मच काय ते होते; दुसरे कांहीच नव्हते. त्या एकमेवाद्वितीय ब्रह्माने ईक्षणमात्रे चराचर सृष्टी केली. सर्व इंद्रिये निर्मिली. जीवांच्या दैनंदिन व्यवहारासाठी नेत्र, कण्ठ आणि हृदय या स्थानी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या अवस्था निर्मिल्या. देहांतराच्या व्यवहारासाठी पितृशरीर, मातृशरीर आणि स्वशरीर असा सर्व प्रपंच निर्माण करून त्यांत प्रवेश केला. ह्या अध्यारोपाचा अपवाद करण्यासाठी तो देहप्रविष्ट प्रत्यगात्मा ब्रह्मस्वरूपच आहे असे प्रतिपादन उपनिषदांत केले आहे. त्यानंतर आत्मज्ञानाचे मुख्य साधन जे वैराग्य त्याच्या उत्पत्तीसाठी *'पुरुषे ह वा'* (ऐतरेय उ. २:१:१) इत्यादींनी गर्भवासादि दुःखांचे वर्णन करून प्रज्ञारूपी आत्माच ब्रह्म आहे हे या वाक्याने प्रतिपादले आहे. विद्यारण्यस्वामींनी ह्या महावाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे.

**ब्रह्मीभूतस्य गव्यात्मा व्यसुः क्षेप्योऽप्क्रियादि नो । इत्युक्त्वा ग्राहयामास संन्यासं स्वधिकारिणः ।।६४।।**

ब्रह्मीभूतस्य व्यसुः आत्मा गवि क्षेप्यः। अप्+ क्रियादि नो। इति उक्त्वा सु+अधिकारिणः संन्यासं ग्राहयामास।६४।

*येनेक्षिते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादू विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितं ।*
*चतुर्मुखेन्द्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्म मय्यपि ।। पंचदशी ५:१-२*

ब्रह्मदेव, इंद्रादि देव तसेच मनुष्य, घोडे, गाई इत्यादीसुद्धां ज्या एका चैतन्याद्वारे ऐकतात, हुंगतात, व्यक्त करतात, गोड-अगोड अनुभवतात त्याला प्रज्ञान म्हणतात. तेच प्रज्ञान माझ्यांतही आहेच. तेच ब्रह्म होय.

**अहं ब्रह्मास्मि -** हे यजुर्वदांतर्गत महावाक्य आहे.

*परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि । बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ।*
*स्वतःपूर्णः परात्मात्र ब्रह्माब्देन वर्णितः । अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म भवाम्यहं ।। पंचदशी ५:३-४*

अधिकारी साधकांच्या बुद्धीत साक्षित्वाने अहं म्हणून स्फुरणारे चैतन्य (जीवात्मा) हा ‘मी’ शब्दाचा अर्थ. सर्वव्यापी सच्चिदानंद स्वयंपूर्ण परमात्मा म्हणजेच ‘ब्रह्म’. ‘आहे’ या शब्दाने दोहोंचे ऐक्य दाखविले आहे.

**तत्त्वमसि -** हे सामवेदांतर्गत वाक्य आहे.

*एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितं । सृष्टेः पुराधुनाऽप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ।*
*श्रोतुर्देहेन्द्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितं । एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयतां ।। पंचदशी ५:५-६*

**ततः प्रभृति संन्यासः संप्रवृत्तोऽमृतायनः । काश्यां पुमर्थवेदार्थान्प्रकाश्योत्तरवर्त्मना ।।६५।।**

ततः प्रभृति अमृतायनः संन्यासः संप्रवृत्तः। काश्यां पुं+अर्थ+वेद+अर्थान् प्रकाश्य उत्तर+वर्त्मना ।६५।

सृष्टीच्या पूर्वी आणि प्रलयाच्या नंतरही जसेच्या तसेच राहणाऱ्या, अविकारी, एकमेवाद्वितीय, सच्चिदानंद परमात्मस्वरूपाला 'ते' (तत्पदाने) म्हणून श्रवण करणाऱ्या शिष्याच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या पलीकडील चैतन्याचा 'तू' या शब्दाने (त्वंपदाने) निर्देश केला आहे. 'आहेस' (असिपदाने) शब्दाने हे दोन्हीचा अभेद प्रतिपादला आहे.६१.

**अयमात्मा ब्रह्म -** हे अथर्ववेदांतील महावाक्य आहे.

*स्वप्रकाशापरोक्षत्वमयमित्युक्तितो मतं । अहंकारादिदेहांतात्प्रत्यगात्मेति गीयते ।*
*दृश्यमानस्य सर्वस्य जगतस्तत्त्वमीर्यते । ब्रह्माब्देन तद्ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम ।। पंचदशी ५:७-८*

आपल्या अंतरांत प्रकाशून प्रतीतीला येणारा अपरोक्ष 'हा' अहंकाराने स्थूल देहाला बांधल्यासारखा भासणारा 'आत्मा'च (प्रत्यगात्मा) अनुभवाला येणाऱ्या सर्व जगताचे मूलतत्त्व असलेले 'परोक्ष ब्रह्म' आहे असा याचा अर्थ आहे.

*सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः । ब्रह्मापरोक्षसिद्ध्यर्थं महावाक्यमितीरितम् ।*
*वाक्यवृत्तावतो ब्रह्मापरोक्ष्यविमतिर्न हि ।। पंचदशी ७:६९-७०*

ही महावाक्ये त्यांच्या अर्थासह जाणून पंचीकरणाचे ज्ञान प्राप्त करून संज्ञा म्हणजे संन्यासाश्रमांतील नांव (योगपट्ट) धारण करून, बाह्य आणि आंतरिक शौच (बाहेरी कर्में क्षाळिला। अंतरीं ज्ञानें उजळिला।) संपादन करून आपल्या (संन्यास) धर्माचे पालन करणारा,६२. दैवी संपत्तीयुक्त योगपट्टधारी संन्याशालाच मोक्षाची योग्यता असते. उत्तरायण, शुक्ल पक्ष आणि दिवस या काळांच्या अभिमानी देवतांद्वारां गंवसणाऱ्या सूर्यकिरणानुसारी गतीचे ज्ञान असणारा हा संन्यासी ब्रह्मसूत्रांत सांगितल्याप्रमाणे (४:२:१८-२०) रात्री किंवा दक्षिणायनांतही मरण पावला तरी ब्रह्मलोकालाच जातो.

**मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मापि सुशिष्ययुक् । तीर्थस्नातो ययौ गङ्गा-सागरं भक्तगुप्तये ।।६६।।**

मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मा+अपि सुशिष्य+युक् तीर्थ+स्नातो भक्त+गुप्तये गंगा+सागरं ययौ।६५-६६।

अशा यतीला धारणेच्या अभ्यासाने जिवंत असतांनाच मुक्तीचा लाभ होतो. नाभी, हृदय, आज्ञाचक्र इत्यादि देशांवर चित्त एकाग्र करणे म्हणजे 'धारणा'. त्या धारणेचा नित्य अभ्यास करणारा यति, **पर** म्हणजे ब्रह्म आणि **आत्मा** म्हणजे प्रत्यगात्मा यांच्यांत अभेद दृष्टी ठेवून जिवंतपणीच अविद्या, काम आणि कर्म यांच्यापासून मुक्त होतो.६३. ब्रह्मीभूत झालेल्या गतप्राण यतीचा देह शक्य तर पाण्यांत सोडावा अथवा ते शक्य नसेल तर जमिनीत पुरावा. **गो** या शब्दाचे पाणी आणि भूमी असेही अर्थ होतात. गतप्राण हे मुंडकोपनिषदांत (३:२:७) वर्णन केलेल्या सर्व कलांच्या निर्गमनाचे उपलक्षण आहे. पंचदश कला आपल्या आधारभूत महाभूतांसह इंद्रियांच्या अधिष्ठानभूत देवतांत विलीन होतात. कर्म, बुद्धी आणि आत्मा हे सर्व परमात्मस्वरूपाशी एकत्व पावतात. छांदोग्य उपनिषदाच्या कथनानुसार (४:१५:५) अशा ज्ञानी पुरुषाच्या देहाचे दहन केले अथवा न केले तरी तो देवयान पंथाने ब्रह्मलोकाला जातो. त्यावर भाष्यकारांनी त्यांचे दहन करू नये असे स्पष्ट केले आहे. अप् म्हणजे जल. जलक्रिया या शब्दाने अंजली, पिंड, निर्वाप, एकोद्दिष्ट श्राद्ध, करण, मासिक श्राद्ध इत्यादि करूं नयेत. मुलगा असेल तर त्याने इतर पितरांसाठी आणि पुत्रत्वाचे कर्तव्य म्हणून पार्वण श्राद्ध करावे. असा हा संन्यासधर्म सर्वांना सांगून श्रीगुरू उत्तम अधिकारी शिष्यांनाच संन्यास देत असत. यावरून अनधिकारी शिष्याला दिलेला संन्यास त्याच्या पतनालाच कारण होतो हे लक्षांत ठेवावे.६४.

तेव्हांपासून मुक्तीचा मार्ग असा संन्यासाश्रम पुनःप्रतिष्ठित झाला. अशा रीतीने श्रीगुरूंनी कांही काळ काशीत चित्तांतील अंधःकार दूर करणाऱ्या वेदांच्या बोधाने योग्य शिष्यांना चारी पुरुषार्थ प्राप्त करविले. नंतर उत्तरेकडील मार्गाने मेरूला सव्य प्रदक्षिणा करून स्वतः पावित्र्याची मूर्ती असलेले श्रीगुरू भक्तांच्या रक्षणासाठी तीर्थांमध्ये स्नान करीत गंगासागराला येऊन पोचले.६५.

**कारयित्वा बहिःस्पर्शान्बाह्यान्सोऽन्ते दृशं भ्रुवोः । प्राणापानौ च खे तुल्यौ यतिभ्यो योगमादिशत् ।।६७।।**
**प्रयागेऽथैत्य संन्यासं माधवब्रह्मणे ददौ । विभुस्तत्त्वोपदेशं च निजोद्भवभुवं ययौ ।।६८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**यत्प्रसादान्नरा मुक्ता अद्वैतामृतवर्षिणः । भवन्त्यस्य किमाचार्यैः कोऽयं कृष्णसरस्वती ।।६९।।**

बहिः+स्पर्शान् बाह्यान् कृत्वा सः दृशः अन्ते भ्रुवोः (कारयित्वा), प्राण+अपानौ खे तुल्यौ (कारयित्वा) यतिभ्यः योगं आदिशत्।६७। अथ प्रयागे एत्य विभुः माधवब्रह्मणे संन्यासं तत्त्व+उपदेशं च ददौ। (ततः) निज+उद्भव+भुवं ययौ।६८। नामधारक उवाच। अद्वैत+अमृत+वर्षिणः यत्+प्रसादात् नरा मुक्ता भवन्ति अस्य किं आचार्यैः? अयं कृष्णसरस्वती कः?६९।

बाहेरच्या रूपरसादि विषयांचे चिंतन केल्याने ते चित्तांत प्रवेश करतात. त्यासाठी त्यांचे चिंतन सोडून त्यांना बाहेरच ठेवायचे. मग दृष्टी भुंवयांच्या मध्यावर स्थिर करायची. डोळे एकदमच मिटले तर चित्त झोपेत लीन होते आणि उघडे ठेवले तर ते चित्त बाहेरच्या विषयांकडे धांवतेय म्हणून अर्धोन्मीलित दृष्टीने भुंवयांच्या मध्यावर दृष्टी केंद्रित करून ती हृदयाकाशांत स्थिर करावी. नासिकेंतून प्रवाहित होणारे श्वास आणि उच्छ्वास मंद करून ते नासिकेंतच सम करायचे. अशा प्रकारच्या ह्या योगाचा अभ्यास यतींच्याकडून श्रीगुरूंनी करून घेतला.६७. त्यानंतर श्रीगुरूंनी प्रयाग क्षेत्री येऊन माधव नांवाच्या ब्राह्मणाला संन्यास दिला आणि त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. तेथून पुढे ते आपल्या जन्मभूमीला गेले.६८. यावर नामधारकाने प्रश्न केला की मोक्षरूपी अमृताची वृष्टी करणाऱ्या श्रीगुरूंच्या प्रसादाने मानवांना मुक्ती मिळते. त्यांना आचार्य करण्याचे काय प्रयोजन? शास्त्रार्थाचे आलोडन करून त्यांतील वेचक तत्त्वांचा इतरांनाही बोध करून देऊन त्यांच्याकडून ती आचारणात आणतात आणि स्वतःसुद्धां त्यांचे आचरण करून आदर्श उभा करतात त्यांना आचार्य म्हणतात. (*'आचिनोति हि शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि। स्वयं चाचरते यस्मात्तेनाचार्यः स उच्यते।।'*) आणि हे कृष्णसरस्वती कोण होते?६९.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सांदीपनिवसिष्ठाद्याः कृष्णरामादिभिर्वृताः । गुरवोऽपि तथाऽजेन वृतः कृष्णसरस्वती ।।७०।।**
**मानुष्यं लीलयासाद्य स तद्वद्वर्तते न चेत् । वर्तेत सङ्करो लोके भवेत्तदनुवर्तितः ।।७१।।**
**येनाध्यक्षेण मा सूते जगत्तेन न बद्ध्यते । असक्तोऽयमुदासीन-वत्स्थितः किमुतेतरैः ।।७२।।**
**शिष्यो विष्णुः पुरेशस्य विष्णोर्विधिरभूद्विधेः । वसिष्ठस्तस्य शाक्त्योऽस्य व्यासस्तस्य शुकोऽस्य तु ।।७३।।**
**गौडपादोऽस्य गोविन्दः शंकरस्तस्य तस्य तु । विश्वरूपस्तस्य बोध-ज्ञानः सिंहगिरिस्तथा ।।७४।।**
**तस्येश्वरो नृसिंहोऽस्य विद्यातीर्थं ततः शिवः । तस्य भागीरथीतीर्थं विद्यारण्योऽस्य तस्य तु ।।७५।।**
**शिष्योऽभून्मलयानन्दो देवतीर्थं सरस्वती । यादवेन्द्रोऽस्य तस्यायं शिष्यः कृष्णसरस्वती ।।७६।।**

सिद्ध उवाच। कृष्ण+रामदिभिः अपि सांदीपनि+वसिष्ठाद्याः गुरवः वृतः। तथा अजेन कृष्णसरस्वती वृतः।७०। लीलया मानुष्यं आसाद्य सः तत्+वत् वर्तते। न वर्तते चेत् तत्+अनु+वर्तितः लोके सङ्करो भवेत्।७१। येन अध्यक्षेण मा जगत् सूते तेन अयं न बद्ध्यते। अयं असक्तः उदासीनवत् स्थितः। इतरैः किं उत?।७२। पुर+ईशस्य विष्णुः शिष्यः। विष्णोः विधिः (शिष्यो) अभूत्। विधेः वसिष्ठः। तस्य शाक्त्यः। तस्य व्यासः। तस्य शुकः। अस्य (शुकस्य) तु गौडपादः। अस्य गोविन्दः। तस्य शंकरः। तस्य (शंकरस्य) तु विश्वरूपः। तस्य बोधज्ञानः। तथा (तस्मात्) सिंहगिरिः। तस्य ईश्वरः। अस्य नृसिंहः। (अस्य) विद्यातीर्थः। ततः शिवतीर्थः। तस्य भागीरथीतीर्थः, अस्य विद्यारण्यः। तस्य तु मलयानंदः शिष्यः अभूत्। (तस्य) देवतीर्थः। (तस्य) सरस्वतीयादवेन्द्रः। अस्य अयं शिष्यः कृष्णसरस्वती।७३-७६।

सिद्ध सांगतात की राम, कृष्ण इत्यादि पूर्वींच्या अवतारांनीही सांदीपनि, वसिष्ठ इत्यादि गुरू केले. त्याचप्रमाणे अविकारी श्रीगुरूंनीही कृष्णसरस्वतींना गुरू केले.७०. स्वच्छेने लीलेने त्याने (भगवंताने) मानवदेह धारण केला असला तरी त्याला अनुसरून ते मानवांना योग्य असेच आचरण करतात. तसे त्यांनी न केले तर अनुकरणशील लोकही विपरीत आचरण करतील आणि भगवंत संकराला कारण होतील.७१.

**सर्वे स्वदीक्षाङ्किताख्या जाताः कृष्णसरस्वती । पारंपर्योत्तमो ज्ञानी वृद्धोऽतोऽयं वृतोऽमुना ।।७७।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनं नामाष्टमोऽध्यायः ।।**

सर्वे स्वदीक्षित+अंकित+आख्याः जाताः। कृष्णसरस्वती पार्यंपर+उत्तमः ज्ञानी वृद्धः। अतः अयं अमुना वृतः।७७।

आतां कृष्णसरस्वतींची गुरुपरंपरा सांगत आहेत. भगवान शंकरांचे शिष्य विष्णू, विष्णूंचे शिष्य ब्रह्मदेव; ब्रह्मदेवांचे शिष्य वसिष्ठ ऋषी; त्यांचे शिष्य पराशर; पराशरांपासून व्यास; व्यासांचे शिष्य शुकाचार्य; शुकाचार्यांचे गौडपादाचार्य; त्याचे शिष्य गोविंदयति; हे भ.पू.पा. शंकराचार्यांचे गुरू; आदिशंकराचार्यांचे शिष्य विश्वरूपाचार्य; त्यांचे बोधज्ञान; त्यांचे शिष्य सिंहगिरी; त्यांच्यापासून नृसिंह; मग विद्यातीर्थ, त्यांचे शिष्य शिवतीर्थ, त्यांचे भागीरथीतीर्थ; हे विद्यारण्यस्वामींचे गुरू; त्यांचे शिष्य मलयानंद; त्यांच्यानंतर देवतीर्थ; त्यांपासून सरस्वतीयादवेन्द्र; यांचेच शिष्य कृष्णसरस्वती होत.७३-७६. सर्वांचे योगपट्ट त्यांच्या त्यांच्या दीक्षेनुसार झाले. तीर्थ, आश्रम इत्यादि उपपदे उपदेश, दंडदानादींची दीक्षा ज्या गुरुस्वामींकडून घेतली त्याची असतात. इथे दिलेला परंपराक्रम हा ज्ञानोपदेशाचा आहे. त्यामुळे उपपदाची भिन्नता दिसून येते. हे कृष्णसरस्वती अशा उत्तम परंपरेचे ज्ञानी असल्याने तसेच वृद्ध असल्याने त्यांना श्रीगुरूंनी आचार्य केले.७७.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा आठवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# नवमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। नवव्या अध्यायी जन्मभूमी पाहुनी। श्रीगुरु विप्राचा पोटशूल वारुनी।**
**सायंदेवाचे यवनभय हरुनी। तीर्थयात्रा वर्णिती।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भगवानपि संन्यासं प्रगृह्य स्वजनुस्थलम् । कुतो यातोऽस्य शिष्याः स्युः के के किमकरोत्ततः ।।१।।**

नामधारक उवाच। भग+वान् अपि संन्यासं प्रगृह्य स्व+जनु+स्थलम् कुतो यातः? अस्य शिष्याः के के स्युः? ततः (श्रीगुरुः) किं अकरोत्?१।

मागच्या अध्यायांत सिद्धमुनींनी श्रीगुरूंनी संन्यासाश्रम स्वीकारल्याचे वर्णन केले; आणि अध्यायाच्या शेवटी आपल्या जन्मभूमीला गेले असे सांगितले. तेव्हां नामधारकाला ते संन्यासाश्रमाला योग्य नाही असे वाटून त्याने प्रश्न केला आहे.

सर्व ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, औदार्य आदींनी संपन्न असलेल्या ('ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां **भग** इतीङ्गना।।') **भगवान्** श्रीगुरूंनी संन्यास घेऊनही ते आपल्या जन्मस्थळी कां गेले? त्यांचे शिष्य कोण कोण झाले? जन्मभूमीला जाऊन पुढे त्यांनी काय केले?१.

### ।। सिद्ध उवाच ।।

**महीं प्रदक्षिणीकृत्य प्रतिज्ञातानुसार्यजः । मातरं द्रष्टुमाप्तो हि माता वन्द्या यतेरपि ।।२।।**
**शिष्या हि बहवो जाता बालः कृष्ण उपेन्द्रकः । ज्ञानज्योतिः सदानन्दो माधवोऽहं च सप्तमः ।।३।।**
**सरस्वत्यन्तसंज्ञाः स्युरेते मुख्यास्तु भूरिशः । आसन्नन्ये स तैः साकमाययौ स्वजनुस्थलम् ।।४।।**

सिद्ध उवाच। महीं प्रदक्षिणी+कृत्य प्रतिज्ञात+अनुसारी अजः मातरं द्रष्टुं आप्तः। हि यतेः अपि माता वन्द्या।२। शिष्या हि बहवः जाताः। बालः, कृष्णः, उपेन्द्रः, ज्ञानज्योतिः, सदानंदः माधवः, अहं च सप्तमः।३। एते सरस्वति+अंत्य+संज्ञाः मुख्याः स्युः। अन्ये तु भूरिशः आसन्। सः तैः साकं स्वजनु+स्थलं आययौ।४।

तीस वर्षांनी पुन्हां माझे दर्शन होईल, असे आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी आणि माता संन्याशालाही वंदनीय असल्याने तिच्या दर्शनासाठी भगवान आले असे उत्तर देतांना सिद्ध म्हणतात पृथ्वीला (मेरु पर्वताला) उजव्या बाजूने परिक्रमा (प्र+दक्षिणं) करून **अजन्मा** श्रीगुरू (इथे अजन्मा शब्दांतून ते मर्त्य नसून केवळ माणूसपणाचे नाटक करीत असल्याचे सुचविले आहे) आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी संन्याशालाही वंद्य अशा मातेच्या दर्शनाला आले. श्रुतीच्या आज्ञेप्रमाणे (जाणत्याने सत्यच बोलावे; खोटे बोलणाऱ्याचा समूळ परिशोष होतो. प्रश्न उ. ६:१) आपल्या वचनाच्या पूर्तीसाठी श्रीगुरू कारंजाला आले. नामधारकाच्या पहिल्या प्रश्नाचे हे उत्तर आहे.२.

कोण कोण शिष्य झाले या प्रश्नाचे उत्तर पुढच्या श्लोकांत देत आहेत. आपल्या ज्येष्ठ पुत्राचे आयुष्य वाढावे अशा हेतूने जसे संसारी लोक त्याच्या नांवाचा उच्चार न करतां त्याला बाळ अशा नांवाने हांक मारतात त्याचप्रमाणे भगवंतांनीही आपल्या पुत्रवत् पहिल्या आणि निकटवर्ती शिष्याचे नांव बालसरस्वती असे ठेवले.

**पितरौ प्रेक्ष्य बन्धूंश्च भगिनीमितरानपि । तत्राददे विश्वरूपः पूजां प्रत्यालयं क्षणात् ।।५।।**

पितरौ, बंधून्, भगिनीं च, इतरान् अपि प्रेक्ष्य तत्र विश्वरूपः क्षणात् प्रति+आलयं पूजां आददे।५।

कारण शिष्यसुद्धां पुत्राप्रमाणेच गौणात्मा मानला आहे. व्यावहारिक पितासुद्धां संन्यास घेतांना किंवा मृत्यूच्या समयी पुत्राला 'तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस' असे अनुशासन करतो आणि त्यानुसार पुत्रही 'मी ब्रह्म आहे, यज्ञ आहे, लोक आहे' असे म्हणतो (बृहदारण्यकोपनिषत् १:५:१७). त्याचा भाव असा - तुम्ही शिकविलेल्या ब्रह्माचे म्हणजे वेदांचे मी अध्ययन आणि अध्यापन करीन, तुम्ही अनुष्ठिलेल्या यज्ञांचे मी अनुष्ठान करीन आणि तुम्ही संपादिलेले स्वर्गादि लोक मीही प्राप्त करीन. याच अर्थाने एतरेय उपनिषदांत (२:४) पुत्राला पुण्यकर्मांत प्रतिनिधित्व करणारा आत्मा असे म्हटले आहे. परमार्थमार्गांतही परम्परा अखंड चालण्यासाठी गुरू आपल्या शिष्याला प्रतिनिधित्व देतो. वेदांनीही शिष्यप्रशिष्य इत्यादि परंपरेला कुल अशीच संज्ञा दिली आहे. मुंडक (३:२:९) आणि मांडूक्य (१०) उपनिषदांत ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या कुळांत ब्रह्म न जाणणारा होत नाही असे म्हटले आहे त्याचा अभिप्राय गुरुकुल असाच आहे. बालसरस्वतीनंतर कृष्ण, उपेन्द्र, ज्ञानज्योती, सदानंद, माधव आणि सातवा स्वतः सिद्ध अशी मुख्य शिष्यांची नांवे सांगितली आहेत.३. सिद्ध पुढे म्हणतात परमगुरू कृष्णसरस्वतींनी दक्षिणमठ संप्रदायाला अनुसरून श्रीगुरूंना नरसिंहसरस्वती असा योगपट्ट दिला तसाच आम्हां सर्व शिष्यांच्याही नांवांच्या शेवटी सरस्वती हे उपनाम दिले. त्यांतील वरील सात जण मुख्य होत. त्याशिवायही अनेक इतर शिष्य होते. त्या सर्वांच्या सह श्रीगुरू आपल्या मातृभूमीला - कारंजाला आले.४. आई-वडील, बंधू, बहीण तसेच इतरही पूर्वाश्रमाचे संबंधी लोक यांना भेटून त्या कारंजा गांवी श्रीगुरूंनी एका वेळी अनेक रूपे धारण करून घरोघरी जाऊन सर्वांची पूजा स्वीकारली.५.

**पित्रार्चितममुं दृष्ट्वा प्राक्स्मृत्याऽम्बाब्रवीत्प्रिय । मृत्यून्मुखीं कुपुत्रां मां योऽरक्षच्छ्रीपदस्त्वयम् ।।६।।**
**मादृग्भवेत्सुत इति प्रतिज्ञातसुसिद्धये । स्वदृगन्यसुताभावात्स्वयमेवाभवत्सुतः ।।७।।**
**श्रीपाद मे त्वं न सुतोऽसि देव भवार्णवादुद्धर मा हरेऽज ।**
**लोकानुसारी खलु वर्तसे चेत् सम्बन्धमेनं स्मर पुत्र मातुः ।।८।।**
**कालदैवक्रियेशात्म-द्रव्याङ्गास्वात्मवैकृताः । तत्संघातः प्रवाहोऽसौ त्वन्मायैतां निवारय ।।९।।**

अमुं पित्रा अर्चितं दृष्ट्वा प्राक् स्मृत्या अम्बा अब्रवीत्, (हे) प्रिय, मां मृत्यु+उन्मुखीं कुपुत्रां यः अरक्षत् अयं तु श्रीपादः।६। मादृक् सुत भवेत इति प्रतिज्ञात+सु+सिद्धये स्व+दृक् अन्य+सुत+अभावात् स्वयम् एव सुतः अभवत्।७। (हे) देव, श्रीपाद, त्वं मे सुतः न असि। (हे) हरे, मां भव+अर्णवात् उद्धर। खलु लोक+अनुसारी वर्तसे चेत् (हे) पुत्र एनं मातुः सम्बंधं स्मर।८। काल+दैव+क्रिया+ईश+आत्म+द्रव्य+अङ्ग+असु+आत्म+वैकृताः तत् संघातः प्रवाहः असौ त्वत्+माया एतां निवारय।९।

त्या श्रीगुरूंची पूजा पिताजी माधव करीत असतांना अम्बामातेची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि ती आपल्या पतीला म्हणाली, 'प्राणनाथा, पूर्वजन्मी कुपुत्राच्या दुःखाने जीव द्यायला निघालेल्या मला वांचवणारा हाच श्रीपाद आहे.६. माझ्यासारखा पुत्र तुला होईल असा मला दिलेला वर तंतोतंत खरा करण्यासाठी, आपल्यासारखा त्रैलोक्यांत दुसरा कोणीच पुत्र न दिसल्यामुळे तो श्रीपादच आपल्या पोटी आला आहे!'७. 'हे श्रीपाद भगवंता, तूं माझा मुलगा नाहीस, साक्षात् हरी आहेस. मला या संसारसागरांतून तार! आणि तूं लोकव्यवहारानुसारच वागणार असशील तर पुत्रा, ह्या आईचे नाते ध्यानांत ठेव! पुं नांवाच्या नरकापासून सोडवणारा तोच पुत्र म्हणवतो ना?'८. '१ **काळ** हा क्षोभक, २ **कर्म** (क्रिया) हे निमित्त, ३ त्यांतला फलाभिमुख झालेला अंश म्हणजे **दैव** किंवा प्रारब्ध, ४ **ईश** म्हणजे जीव, ५ **आत्मा** म्हणजे कर्माच्या संस्कारापासून घडलेला त्याचा स्वभाव, ६ **द्रव्य** म्हणजे पंच तन्मात्रा (पांच महाभूतांचे सूक्ष्म अंश), ७ **अंग** म्हणजे त्यांनी घडलेला देह, ८ **असु** म्हणजे सूत्ररूप प्राण, ९ **आत्मा** म्हणजे अहंकार आणि १० **वैकृत** म्हणजे ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, मन आणि ५ महाभूते हे सोळा पदार्थ, या सर्वांचा संघात असलेल्या

|| श्रीगुरुरुवाच ||

**संन्यासी यत्कुले जातस्तरत्यपि तरिष्यति । कुलैकविंशतिः पित्रोर्दुर्गताप्यमृतं लभेत् ।।१०।।**
**जातोऽत्रायं हि संन्यासी भो मातस्तेऽथ किं वद । सम्पत्प्रजान्वितानां वः काश्यां मुक्तिर्भविष्यति ।।११।।**

|| भगिन्युवाच ||

**गतिर्मे काग्रतः स्वामिन्भवसिन्धोर्बिभेम्यहम् । पापिष्ठां मोद्धर हरे सद्गुरुस्त्वं हि मे प्रभो ।।१२।।**

श्रीगुरुः उवाच। 'यत्+कुले संन्यासी जातः (तत् कुलं) तरति अपि पित्रोः (भव्या) कुल+एकविंशतिः तरिष्यति। दुर्गतां अमृतं लभते'।१०। 'अत्र अयं हि संन्यासी जातः। भो मातः अथ ते किं वद्। सम्पत्+प्रजा+अन्वितानां वः काश्यां मुक्तिः भविष्यति'।११। भगिनी उवाच। '(हे) स्वामिन्, मे अग्रतः का गतिः? अहं भव+सिन्धोः बिभेमि। (हे) हरे, पापिष्ठां मां उद्धर। (हे) प्रभो त्वं हि मे सद्गुरुः'।१२।

लिंगदेहाचा जन्ममरणरूपी प्रवाह (देहरूपी बीजापासून कर्म आणि त्या कर्मापासूनच पुन्हा अंकुरणारा देह), ही सगळी देवा, तुझीच माया आहे. ही मिथ्या असली तरी आम्हांला तिचा पार सांपडत नाही. तूंच आम्हांला हिच्यापासून सोडव.'९.

श्रीगुरु म्हणाले, 'ज्या कुळांतील कुणी पुरुष संन्यासी होतो ते कुळ तर तरतेच पण माता आणि पिता या दोन्हीच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. कुणी नरकांतही गेले असले तर त्यांना मोक्ष मिळतो.' इथे मोक्ष म्हणजे आत्यंतिक मोक्ष नसून सापेक्ष - उच्चलोकप्राप्तीरूप मोक्ष समजावा.१०. 'तुमच्या ह्या कुळांत तर हा - साक्षात् परमात्मस्वरूप मी संन्यासी झालो आहे. हे माते, आतां तुझे आणखी काय करायचे राहिले आहे? संतती आणि संपत्ती यांनी समृद्ध असे तुम्ही उभयतां काशीक्षेत्री मुक्ती पावाल!'११. श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई त्यांना विनवीत आहे. 'महाराज, माझी यापुढे काय गती होईल? या संसारसमुद्राची मला भीती वाटते. आपणच माझे सद्गुरू आहांत. तरी माझा पापिणीचा आपण उद्धार करावा!'१२.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पतिसेवनमेवैकं तारकं नापरं स्त्रियाः । पातिव्रत्यं भज ततो भवाब्धेः पारमेष्यसि ।।१३।।**
**दम्पत्योः प्राक्कृतं वैरं त्वया गौर्लत्तया हतः । अतः पत्युर्यतित्वं ते कुष्ठं चाङ्गे भविष्यतः ।।१४।।**
**इति श्रुत्वातिखिन्नाभूत्तामाश्वास्याह सद्गुरुः । वार्धक्ये तूभयं तेऽस्तु नश्येन्मे दर्शनात्कुरुक् ।।१५।।**
**इत्युक्त्वा तदनुज्ञातः सशिष्यो गौतमीं ययौ । याऽऽनीता गौतमेनेशाद् गोहत्याव्यपनुत्तये ।।१६।।**

श्रीगुरुः उवाच। 'स्त्रियाः पति+सेवनं एव एकं तारक्। न अपरम्। पातिव्रत्यं भज। ततः भव+अब्धेः पारं एष्यसि।१३। इति श्रुत्वा (सा) अति खिन्ना अभूत्। सद्गुरुः ताम् आश्वास्य आह। 'उभयं तु ते वार्धक्ये अस्तु। मे दर्शनात् कुरुक् नश्येत्।१४। प्राक् त्वया दम्पत्योः वैरं कृतम्। (तथा च) गौः लत्तया हता। अतः ते पत्युः यतित्वं च ते अङ्गे कुष्ठत्वं भविष्यतः'।१५। इति उक्त्वा (श्रीगुरुः) तत्+अनुज्ञातः सशिष्यः गौतमीं ययौ। या गौतमेन गो+हत्या+व्यपनुत्तये ईशात् आनीता।१६।

श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतीची सेवा हाच एक तरणोपाय आहे. अन्य कोणताही नाही. तरी तूं पातिव्रत्यधर्माचे पालन कर. त्याच्याच योगाने तू हा भवसागर पार करशील.'१३. हे ऐकून रत्नाबाई घाबरून व्याकुळ झाली. 'तेव्हां तिची समजूत घालीत सद्गुरू म्हणाले, 'ह्या दोन्ही गोष्टी तुझ्या उतारवयांत होतील. तसेच तुझा कुष्ठरोग माझ्या केवळ दर्शनानेच नाश पावेल.१४. पूर्वजन्मी तू पतिपत्नीत भांडण लावलेस आणि गोमातेला लाथ मारलीस. त्या योगे तुझा नवरा संन्यास घेऊन जाईल आणि तुझ्या शरीराला कुष्ठरोग होईल.'१५. असे बोलून श्रीगुरूंनी आपली भगिनी, बंधुवर्ग, माता, पिता आणि इतर कारंजवासीय संबंधितांचा निरोप घेतला; आणि शिष्यवर्गांसह ते दक्षिण दिशेला गोदावरीला गेले, ज्या नदीला गौतम ऋषींनी आपल्या तपोबलाने भगवान् शंकरांना प्रसन्न करून स्वर्गांतून सह्याद्रि पर्वतावर आणले. त्याची कथा कूर्मपुराणांत सविस्तर आहे.

**तामेत्याप्लुत्य भगवान्मुनिं माधवसंज्ञकम् । भक्तं गतानुगतान्मुक्त्वा स्तुतस्तेनाग्रतोऽगमत् ।।१७।।**
**सशिष्योऽग्रे व्रजन्दृष्ट्वा गङ्गायां मर्तुमुत्सुकम् । विप्रं गलशिलं कञ्चिदादिष्टैस्तं कृपानिधिः ।।१८।।**
**छात्रैरुद्धारितं दीनं शूलरोगाकुलं प्रभुः । दयनीयतमं प्राह विधत्से साहसं कुतः ।।१९।।**

तां एत्य आप्लुत्य भगवान् माधवसंज्ञकं मुनिं गत+आगतात् मुक्त्वा तेन स्तुतः अग्रतो अगमत्।१७। सशिष्यः अग्रे व्रजन् गङ्गायां मर्तुं उत्सुकं कञ्चित् गलशिलं विप्रं दृष्ट्वा आदिष्टैः छात्रैः उद्धारितं दीनं शूलरोग+आकुलं दयनीयतमं कृपानिधिः प्रभुः प्राह, 'साहसं कुतः विधत्से?'१८-१९।

थोडक्यांत, ऋषींनी आपल्या स्वार्थासाठी मायेने दर्भापासून निर्माण केलेल्या गाईला गौतमांच्या साळी खाण्यासाठी प्रेरित केले. आपल्या साळींची राखण करण्यासाठी गौतमांनी तिचे निवारण केले तेव्हां त्यांच्या केवळ करस्पर्शानेच ती मायावी गाय मरण पावली. तेव्हां सर्व ऋषींनी मिळून गौतमांना ह्या गोहत्येच्या पातकापासून मुक्त होण्यासाठी स्वर्गांतून गंगा पृथ्वीवर आणण्याचे प्रायश्चित्त सांगितले. १६. त्या गोदावरी नदीवर येऊन त्यांनी स्नान केले. तिथे असलेल्या माधव नांवाच्या एका तपस्वी मुनीला त्यांनी आपल्या उपदेशाने जन्ममरणरूपी संसारांतून मुक्त केले. नंतर त्याने केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून ते पुढे निघाले.१७. शिष्यांसह गोदावरीतीराने पुढे गेल्यावर त्यांना गळ्यांत धोंडा बांधून आत्महत्येला उद्युक्त झालेला कुणी एक ब्राह्मण दिसला. आपल्या शिष्यांना सांगून दयासागर प्रभूंनी त्या पोटशूळाने तडफडणाऱ्या दीनवाण्या ब्राह्मणाला कां असे साहस करीत आहेस? असे विचारले.१८. तो ब्राह्मण उत्तरला, मला हे विचारून काय उपयोग? माझा दुःखनाश तुम्ही कराल काय? अन्नाचा वैरी असलेला हा पोटशूळ नांवाचा विकार आतां अगदी सोसवत नाही. मी कसा जगूं? या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांनी या विकाराची योगरत्नाकरांत दिलेलली लक्षणे उद्धृत केली आहेत.

**।। विप्र उवाच ।।**

**किं करिष्यसि मां पृष्ट्वा मरिष्ये शूलकातरः । कथं जीवामि रोगोऽन्न-वैर्ययं दुःसहः सदा ।।२०।।**
**प्राणोऽन्नं जीवनं चान्नं लयोऽन्नं जीवमन्नमुत् । उद्भवोऽन्नं कथं स्थेयमृतेऽन्नात्तन्मृतिर्वरम् ।।२१।।**

विप्र उवाच। मां पृष्ट्वा किम् करिष्यसि? शूलकातरः मरिष्ये। अन्न+वैरी अयं रोगः सदा दुःसहः। कथं जीवामि?२०। किं 'अन्नं प्राणः जीवनं च। अन्नं लयः। अन्नं जीवम्। अन्नं उद्भवः। अन्नात् ऋते कथं स्थेयम्? तत् मृतिः वरम्!२१।

कुशींत, जठराच्या पाठीमागे, स्तनांजवळ, पाठीच्या खालच्या भागांत यापैकीं एक वा अनेक भागांत हा शूल उत्पन्न होतो. थोडे कांही खाल्ल्याने, उलटी झाल्याने किंवा अन्नाचे पचन झाल्यावर हा शूळ शांत होतो. षाष्टिक, साळी, तांदूळ यांच्या सेवनाने हा शूल वाढतो. त्यांच्या परिणामाने उद्भवणारा हा शूल ही जाणण्याला कठिणतम अशी महाव्याधि आहे. (*'बलासः प्रच्युतस्थानात्पित्तेन सह मूर्छितः।। वायुमादाय कुरुते शूलं जीर्यति भोजने।। कुक्षौ जठरपार्श्वेषु नाभौ बस्तौ स्तनान्तरे।। पृष्ठमूलप्रदेशेषु सर्वेष्वेतेषु वा पुनः।। भुक्तमात्रेऽथवा वान्ते जीर्णान्ने च प्रशाम्यते।। षाष्टिकव्रीहिशालीनामोदनेन विवर्धते।। तत्परिणामजं शूलं दुर्विज्ञेयं महागदम्'*) १९.

स्वस्थानापासून भ्रष्ट झालेला कफ पित्ताशी संयुक्त होऊन वायूच्या साह्याने शूल निर्माण करतो. हा शूल भोजनाने कमी होतो.'अन्नगत प्राण असल्याने अन्न हेच जीवन आहे. झोपही अन्नानेच येते. औषधरूपाने जगवणारेही अन्नच आहे. वीर्यरूपाने परिणत होऊन अन्नच जन्माला कारण होते. अन्नाशिवाय कसे राहतां येईल? त्यापेक्षां मला मरणच बरे वाटते.२१. 'मी पूर्वजन्मी किंवा याच जन्मी न भुकेल्याला अन्न दिले न कांही पुण्य केले. तसेच मी कांही पुण्यकर्मही केले नाही. आईवडील, गुरू इत्यदिकांची निन्दा केली असावी.२२.

**भवान्तरेऽत्र वा नान्नं दत्तं पुण्यं न वा कृतम् । गोविप्रग्रासोऽपहृतो निन्दिताः पितरौ गुरुः ।।२२।।**
**नेशोऽर्चितो वातिथयो हापिता धिक्कृता द्विजाः । मिष्टान्नं पितरौ त्यक्त्वा साकं भुक्तं स्त्रिया मया ।।२३।।**
**इति भात्यन्यथा नेदृक्कष्टं भो मय्युपस्थितम् । कृतो नान्योपकारो भूभारो मोघभवोऽभवम् ।।२४।।**
**मा भीर्दास्येऽन्नपथ्यं ते दिव्यौषधमहं भिषक् । इत्युक्त्वा विरते तस्मिन्द्विज एकः समाययौ ।।२५।।**
**सायंदेवाभिधः काञ्ची-वासी कौंडिण्यगोत्रजः । सुदीनो यवनाधीनस्तमाह प्रणतं गुरुः ।।२६।।**

(मया) भव+अंतरे अत्र वा अन्नं न दत्तं न वा पुण्यं कृतम्। (वा) गो+विप्र+ग्रासः अपहृतः। पितरौ, गुरुः (वा) निन्दिताः।२२। ईशः न अर्चितः वा अतिथयः हापिताः (वा) द्विजाः धिक्कृताः। मया पितरौ त्यक्त्वा स्त्रिया साकं मिष्टान्नं भुक्तम्।२३। इति भाति। भोः (गुरो) अन्यथा ईदृक् कष्टं मयि न उपस्थितम्। (मया) अन्य+उपकारः न कृतः। (तस्मात् अहं) भू+भारः मोघभवः अभवम्।'२४। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अहं भिषक्। ते अन्नपथ्यं दिव्य+औषधं दास्ये।' इति उक्त्वा तस्मिन् (श्रीगुरौ) विरते एकः द्विजः समाययौ।२५। सायंदेव+अभिधः काञ्ची+वासी कौण्डिण्य+गोत्रजः यवन+अधीनः सुदीनः। तं प्रणतं गुरुः प्राह।२६।

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

ईश्वराचे पूजनसुद्धां केले नाही; (माध्यान्हकाळी) अतिथीला हांकलले असावे; ब्राह्मणांचा अपमान केला असावा. आईवडिलांना सोडून मी बायकोबरोबर मिष्टान्न खाल्ले असावे.२३. अहो, असे नसते तर मला हे दुर्धर दुःसह कष्ट झालेच नसते. कसलाही परोपकार न केल्याने मी भूमीला भारभूत झालो आहे. हा माझा जन्म व्यर्थ आहे.'२४. श्रीगुरु त्याला म्हणाले, 'भिऊं नकोस! मी वैद्य आहे. तुला अन्न पचावे असे दिव्य औषध मी तुला देतो. असे श्रीगुरू बोलतात तोच त्यांच्याकडे एक ब्राह्मण आला.२५. सायंदेव नांवाचा तो कौण्डिण्य गोत्रीय ब्राह्मण उत्तरकांची(कडगंची)चा राहणारा होता आणि म्लेच्छाची चाकरी करीत होता. त्या विनम्र ब्राह्मणाने श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां त्याला श्रीगुरू म्हणाले.२६.

**मर्तुमिच्छति रुग्णोऽयं व्यथितो दिव्यमौषधम् । दद्म्यस्मै त्वमपि ब्रह्मन्पथ्यं स्वाद्वन्नमर्पय ।।२७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**मासा पक्षेण वाल्पान्नं भुङ्क्त आत्यन्तिकीं व्यथाम् । स तदाप्नोत्यन्नदानाद् भवेद्धत्येति भाति मे ।।२८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भिषक्तमोऽस्मि नाशङ्क्यं सापूपं देहि माषयुक् । परमान्नं च पथ्यं मा भीर्जाने रुक्प्रतिक्रियाम् ।।२९।।**

अयं रुग्णः व्यथितः मर्तुम् इच्छति। तस्मै दिव्यं औषधं दद्मि। '(हे) ब्रह्मन्, त्वं अपि पथ्यं स्वादु अन्नं अर्पय।'२७। सायंदेवः उवाच। सः मासा पक्षेण वा अल्प+अन्नं भुङ्क्ते। तदा आत्यन्तिकीं व्यथां आप्नोति। अन्न+दानात् हत्या भवेत् इति मे भाति'।२८। श्रीगुरुः उवाच। 'भिषक्+तमः अस्मि। न आशंक्य स+अपूपं माषयुक् पथ्यं परमान्नं च देहि। मा भीः, रुक्+प्रतिक्रियां जाने।'२९।

'हा रोगी अत्यंत त्रासून मरायला निघाला आहे. मी ह्याला दिव्य औषध देतो आहे. तूंसुद्धां त्याला पथ्यकर गोड अन्न दे.'२७. सायंदेव उत्तरला, 'ह्याने महिन्या-पंधरवड्याला कधी तरी थोडेसेही अन्न खाल्ले तरी त्याला भयंकर वेदना होतात. मी अन्न दिले तर न जाणो, ह्याला कांही झाले तर मला ब्रह्महत्येचे पाप लागेल अशी मला भीती वाटते.'२८. श्रीगुरू म्हणाले, 'मी उत्तम वैद्य आहे. ईश्वरस्वरूप असल्याने श्रीगुरूंनी स्वतःला **भिषक्तम** (ऋग्वेद २:३३:४) म्हणणे योग्यच होय. मनांत कांहीही शंका न आणतां अपूप, उडदाचे वडे, पायस इत्यादींसह चारी ठाव भोजन ह्याला दे. घाबरूं नकोस, मी रोगाचा प्रतिकार उत्तम प्रकारे जाणतो.'२९. सायंदेवाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार करायचे मान्य केले आणि तो त्यांना म्हणाला, 'आपणही आपल्या शिष्यांसह माझ्या घरी येऊन भिक्षेचा स्वीकार करावा. मी आपला शिष्य होत आहे. तरी हे सद्गुरो, मी आपल्याला शरण आलो आहे, आपण मला मार्गदर्शन करा.'३०.

### ।। सायंदेव उवाच ।।

**तथा कुर्यामपि भवान्सशिष्योऽङ्गीकरोतु मे । भिक्षां गृहेऽस्मि ते शिष्यः प्रपन्नं शाधि मां गुरो ।।३०।।**
**इत्युक्तिं सौष्ठवौदार्य-रम्यां श्रुत्वा तथेति तम् । ऊचे ततः सशिष्यं तं द्विजो निन्ये निजालयम् ।।३१।।**
**चित्रितेऽलङ्कृते गेहे रंगवल्ल्यादि रञ्जिते । स्वासनेषूपवेश्यैतानुपतस्थेऽङ्गनान्वितः ।।३२।।**

सायंदेव उवाच। 'तथा कुर्याम्। सशिष्यः भवान् अपि मे गृहे भिक्षां अङ्गीकरोतु। ते शिष्यः अस्मि। (हे) गुरो, प्रपन्नं मां शाधि।'३०। इति सौष्ठव+औदार्य+रम्यां उक्तिं श्रुत्वा (श्रीगुरुः) तं 'तथा' इति ऊचे। द्विजः निजालयं निन्ये।३१। चित्रिते अलंकृते रङ्गवल्ल्यादि रंजिते गेहे सु+आसनेषु उपवेश्य अङ्गना+अन्वितः (सायंदेवः) उपतस्थे।३२।

**संन्याशाचे पूज्यत्व -** हे त्याचे औचित्यापूर्ण आणि उदार बोलणे ऐकून श्रीगुरूंनी त्याला होकार दिला. मग तो सायंदेव त्या सर्वांना आपल्या घरी घेऊन गेला.३१. नयनरम्य चित्रांनी, तोरण-पताकांनी तसेच आकर्षक रांगोळ्यांनी सजविलेल्या त्या घरी श्रीगुरूंना उत्तम आसनावर बसवून त्यांची परमेश्वरभावाने पूजा केली. श्रीगुरू साक्षात् भगवंत आहेत हे ज्ञान नसतांनाही, त्यांच्या वेदज्ञानाने, संन्यासित्वामुळे सायंदेवाच्या मनांत हे ईश्वररूप आहेत अशी बुद्धी उपजली. ही भगवद्गीतेच्या (१५:१) प्रतिपादनाशी जुळणारी आहे. ('वरती मुळे आणि खाली शाखा असलेल्या, वेद ज्याची पाने आहेत अशा अक्षय अश्वत्थाला जाणणारा वेदवेत्ता होय.') श्राद्धाच्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रांतही (२:१५) हेच सांगितले आहे. 'जेवढ्या म्हणून देवता आहेत त्या सर्व वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाच्या ठायी वसतात. त्यासाठी वेदज्ञ ब्राह्मणांना रोज नमस्कार करावा, त्यांचा आदर करावा, त्यांच्याशी अश्लील भाषण करूं नये. अशानेच देवता संतुष्ट होतात.' वित्त, दारा (पुत्र) आणि लोक या सर्वांच्या आसक्तीचा (एषणांचा) त्याग करून दण्डादि धारण करून भिक्षावृत्तीचा अंगीकार करणारा संन्यासी होतो. अशा संन्याशाला शास्त्रांनी साक्षात् विष्णूंचेच स्वरूप मानले आहे. असा यति ज्या घरी जेवतो तिथे साक्षात् विष्णूच जेवतात. ह्या ठिकाणी तर श्रीगुरू ब्रह्मस्वरूपच असल्याने हा भ्रम जरी मानला तरी संवादी भ्रमच होतो.३२.

**सूपचारैः प्रपूज्येशं रौद्रैर्मन्त्रैश्च पौरुषैः । नीराज्य श्रद्धया गीत-स्तोत्रादिभिरतोषयत् ।।३३।।**
**गुरुपादोदकं तीर्थं भक्त्या संपूज्य मुक्तिदम् । पीत्वैनोहारि सस्त्रीकः शिष्यान्सर्वानपूजयत् ।।३४।।**
**अन्नं चतुर्विधं स्वादु सुरसं गव्यसंयुतम् । प्रादात्प्रकामं सर्वेभ्यो मधुरोक्त्यादरेण सः ।।३५।।**

ईशं सु+उपचारैः रौद्रैः पौरुषैः च मन्त्रैः श्रद्धया प्रपूज्य नीराज्य गीत+स्तोत्रादिभिः अतोषयत्।३३। एनो+हारी मुक्तिदं गुरु+पाद+उदकं तीर्थं सस्त्रीकः भक्त्या संपूज्य पीत्वा सर्वान् शिष्यान् अपूजयत्।३४। सः चतुर्विधं स्वादु सुरसं गव्य+संयुतं अन्नं सर्वेभ्यो प्रकामं मुधर+उक्त्या आदरेण प्रादात्।३५।

त्याने उत्तम उपचारांनी, शतरुद्रीय आणि पुरुषसूक्त यांच्या मंत्रांनी श्रद्धापूर्वक सद्गुरूंचे पूजन केले, आरती केली आणि गीत, स्तोत्रे इत्यादींनी त्यांना प्रसन्न केले.३३. गुरुगीतेत *'शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः।'* असे गुरुचरणांच्या तीर्थाचे वर्णन आहे. अशा पापविनाशी आणि मुक्तिप्रद तीर्थाचे सपत्नीक भक्तिभराने षोडशोपचार पूजन करून सायंदेवाने ते प्राशन केले. तसेच सर्व शिष्यांचीही त्याने यथायोग्य पूजा केली.३४. यानंतर सायंदेवाने सर्वांना भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चारी प्रकारचे, दूध, दही, तूप, लोणी यांनी युक्त, मधुर अन्न आदराने आणि गोड (आर्जवी) भाषणासहित यथेच्छ खाऊं घातले. ते सहाही रसांनी चविष्ट केले होते. आयुर्वेदांत भोजन गोड असावे असे म्हटले आहे. तसेच गीतेनेही (१७:८) रसयुक्त, स्निग्ध, स्थिर आणि हृद्य आहाराला सात्त्विक म्हटले आहे. चतुर्विध अन्न - दांतानी तुकडे करून खाल्ले जाते ते अपूपादि **भक्ष्य**, न चावतां नुसते गिळले जाते ते पायसादि **भोज्य**, जिभेने चाटून खाल्ले जाणारे गूळ वगैरे **लेह्य**, दांतानी चोखून रस घेऊन नीरस भाग टाकून जे सेवन केवे जाते ते ऊस वगैरे **चोष्य**.३५.

**भुक्त्वान्नं गुरुपङ्क्त्यां स भेजे रुग्णोऽप्यनामयम । नेदं चित्रं हि यद्भक्ता घ्नन्त्युद्भवमहारुजम् ।।३६।।**
**स ततोऽसारसंसार-निर्विण्णो गुरुदर्शनात् । भूत्वा क्षणादुदासीनः सर्वतोऽभजदच्युतम् ।।३७।।**
**द्विजोऽपि भुक्तानाचान्तान्सूपविष्टान्सुगन्धिभिः । पत्सैवनैश्चास्यवासैस्तोषयित्वाऽब्रवीद्गुरुम् ।।३८।।**
**अङ्घ्र्यब्जवन्दनात्तेऽद्य सफलं जन्मकर्म मे । पितरोनुग्रहान्मुक्तास्तत्कृतार्थोऽस्मि निर्मलः ।।३९।।**

सः रुग्णः गुरु+पंक्त्यां अन्नं भुक्त्वा अनामयं भेजे। इदं चित्रं न हि यत्+भक्ताः उद्भव+महा+रुजं घ्नन्ति।३६। ततः असार+संसार+निर्विण्णः सः गुरुदर्शनात् (एव) क्षणात् उदासीनः सर्वतः अच्युतं अभजत्।३७। द्विजः अपि भुक्तान् आचान्तान्, सु+उपविष्टान् सुगन्धिभिः पत्+सेवनैः आस्य+वासैः तोषयित्वा गुरुं अब्रवीत्।३८। अद्य ते अंघ्रि+अब्ज+वंदनात् मे जन्म+कर्म सफलम्। अनुग्रहात् पितराः मुक्ताः। तत् निर्मलः कृतार्थः अस्मि।३९।

तो रोगी ब्राह्मणही श्रीगुरूंच्या पंक्तीला अन्न ग्रहण करून निरोगी झाला. श्रीगुरूंच्या पंक्तीला म्हणजे त्यांच्या शिष्यांच्या पंक्तीला असा अर्थ घ्यावा; किंवा श्रीगुरूंचे शिष्य सगळे संन्यासीच, अर्थात् गुरुस्थानीच असल्याने गुरूंची पंगत असाही अर्थ घेतां येईल. तसेच गरूंच्या पंक्तीला जेवला ह्यांत त्या रुग्णाचा समावेश श्रीगुरूंच्या शिष्यवर्गांत झाल्याचीही सूचना आहे. तो पोटशूळ बरा झाला यांत आश्चर्य कांहीच नाही; कारण श्रीगुरूंचे भक्त जन्ममरणरूपी महारोगाचाही नाश करतात.३६. केळीच्या खुंटासारख्या निस्सार संसारापासून विरक्त झालेला तो रोगमुक्त ब्राह्मण केवळ श्रीगुरूंच्या दर्शनानेच तत्काळ उदासीन झाला आणि सर्वभावे सच्चिदानंदस्वरूपापासून कधीही च्युत न होणाऱ्या सद्गुरूंचा भक्त झाला.३७. मग सायंदेव ब्राह्मणाने भोजन केरून आंचवलेल्या सर्वांना छानशा आसनांवर बसवून सुगंधी पदार्थ अर्पण केले. तसेच मुखवासही दिला. विडा (तांबूल) संन्याशांना निषिद्ध असला तरी विलायची किंवा लवंग सेवन करतां येते. मग त्याने श्रीगुरूंची प्रार्थना केली.३८. 'श्रीगुरुमहाराज! आपल्या चरणकमलांना वंदन केल्याने माझा जन्म आणि माझे सर्व कर्म सफल झाले आहेत. आपल्या कृपानुग्रहाने माझे सर्व पितरही मुक्त झाले आहेत. यामुळे आत्मज्ञानाला आड येणारी सर्व पापे नाश पावून मी निर्मल झालो आहे व मी कृतकृत्य झालो आहे.३९.

**गङ्गा पापं विधुस्तापं दैन्यं कल्पतरुर्हरेत् । वायुस्तूलमिवैतत्ते दर्शनं हरति त्रयम् ॥४०॥**
**साक्षी सर्वान्तरस्थस्त्वं परात्माऽधोक्षजोऽमलः । नृरूपेणावतीर्णोऽसि साधूंस्त्रातुमजोऽव्ययः ॥४१॥**
**देहि मे तेऽमलं दास्यं श्रद्धोपेतं कुलाय च । याचेऽदो भगवन्नेको ममाधिस्तन्निशामय ॥४२॥**
**यन्निघ्नोऽस्मि स वै हिंस्रो यवनो हन्ति भूसुरम् । प्रत्यब्दमाह्वयत्यद्य तदर्थमिति शुश्रुम ॥४३॥**

गङ्गा पापं, विधुः तापं, कल्पतरुः दैन्यं हरेत्। ते दर्शनं त्रयम् अपि वायुः तूलं इव हरति।४०। साक्षी सर्व+अंतरस्थं अधोक्षजः अमलः अजः अव्ययः त्वं साधून् त्रातुं नृ+रूपेण अवतीर्णः असि।४१। मे कुलाय च ते अमलं श्रद्धा+उपेतं दास्यं देहि अदः याचे। भगवन्, मम एकः आधिः निशामय।४२। (अहं) यत्+निघ्नः सः हिंस्रः यवनः प्रत्यब्दं भूसुरं हन्ति वै। तदर्थं अद्य (मां) आह्वयति इति शुश्रुम।४३।

गंगा पाप, चंद्रमा ताप आणि कल्पवृक्ष दैन्य दूर करतात. आपले दर्शन मात्र या तिन्हींना, वाऱ्याने कापूस उडवून लावावा, तसे पळवून लावतात.'४०. 'सर्वांच्या अंतर्यामी साक्षित्वाने राहणारा परमात्मा तूं आहेस. **अक्ष** म्हणजे नेत्रादि इंद्रियांना **अधः** म्हणजे अंतर्मुख केल्याने जो चित्तांत प्रकटतो तो अधोक्षज तूंच आहेस. रागद्वेषादि चित्ताचे मल धुऊन टाकणारा जन्ममरणादि विकाररहित अक्षय पुरुष असूनही तूं साधूच्या परित्राणाकरिता मानुष रूपाने अवतरला आहेस.४१. मला आणि माझ्या वंशाला आपले अव्यभिचारी आणि श्रद्धापूर्ण दास्य द्यावे हेच मागणे आहे. भगवंता, माझ्या मनाला एक घोर चिंता लागलेली आहे ती आपण ऐकावी.४२. माझा स्वामी असलेला क्रूर म्लेच्छ प्रतिवर्षी एका ब्राह्मणाला ठार करतो. त्यासाठीच त्याने आज मला बोलावले आहे असे आमच्या कानांवर आले आहे.४३. श्रीगुरू सायंदेवाला म्हणाले, भिऊं नकोस! तो यवन कितीही निष्ठुर असूं दे, तूं बिनधास्त त्याच्याकडे जा. तो तुझा सत्कारच करील. मग आनंदाने तूं परत ये. तोंपर्यंत मी इथेच थांबतो. चिंता सोड.४४.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**मा भीः क्रूरमपीदानीं यवनं याह्यसंशयम् । मुदैष्यस्यर्चितस्तेन तावत्तिष्ठामि मा शुचः ।।४४।।**
**इत्याकर्ण्यापशङ्कं स ययौ यवनमञ्जसा । शस्त्रैर्विप्रश्छिनत्तीति भ्रान्तोऽरं यवनस्तदा ।।४५।।**
**तं तुष्ट्वा वस्त्रभूषार्थैः प्राह गच्छ सुखं द्विज । सायंदेवोऽपि वीताधिर्हृष्टः श्रीगुरुमाययौ ।।४६।।**
**सर्पोऽप्यद्याद्विराजोऽर्भं हरेर्वेभो गुरुप्रियम् । न क्षमोऽप्यन्तको द्रष्टुं यवनः किमुताल्पकः ।।४७।।**
**दासोऽसीष्टं लभेत्ते मे द्व्यष्टाब्दैर्दर्शनं भवेत् । द्विजेत्युक्त्वा वैद्यनाथं गत्वान्तर्दध ईश्वरः ।।४८।।**

श्रीगुरुः उवाच। मा भीः। क्रूरं अपि यवनं असंशयं याहि। तेन अर्चितः मुदा एष्यसि। तावत् तिष्ठामि। मा शुचः।४४। इति आकर्ण्य सः अपशङ्कं अञ्जसा यवनं ययौ। तदा शस्त्रैः विप्रः (मां) छिनत्ति इति अरं भ्रान्तः यवनः।४५। तं वस्त्र+भूषा+अर्थैः तष्ट्वा प्राह, (हे) द्विज, सुखं गच्छ! सायंदेवः अपि वीत+आधिः हृष्टः श्रीगुरुं आययौ।४६। विराजः अर्भं सर्पो अद्यात् अपि हरेः वा (अर्भं) इभो (अद्यात्)? गुरु+प्रियं अंतकः अपि द्रष्टुं न क्षमः। किं उत अल्पकः यवनः?४७। (हे) द्विज, (मम) दासः असि। ते इष्टं लभेत्। द्वि+अष्ट+अब्दैः मे दर्शनं भवेत्। इति उक्त्वा वैद्यनाथं गत्वा ईश्वरः अन्तर्दधे।४८।

हे श्रीगुरूंचे आश्वासनपर भाषण ऐकून तो सायंदेव निःशंक मनाने लगेच त्या यवनाकडे गेला. त्या वेळी त्या यवनाला अशी गाढ भ्रांती झाली की एक ब्राह्मण आपले शस्त्राने तुकडे करतो आहे.४५. त्यामुळे प्रभावित होऊन त्याने सायंदेवाला वस्त्रे, अलंकार आणि द्रव्य देऊन सन्मानित केले आणि म्हणाला, अहो विप्रवर, आपण सुखाने घरी जा. त्याबरोबर मरणभय दूर झाल्याने हरखलेला सायंदेव श्रीगुरूंकडे परतला.४६. गरुडाच्या पिलाला कदाचित् सापही खाऊं शकेल किंवा सिंहाच्या छाव्याला हत्तीही गिळेल; परंतु गुरुभक्ताकडे पाहण्याचीही साक्षात् यमाचीही बिशाद नाही. मग त्या क्षुद्र यवनाची काय कथा?४७. यवनाकडून परतलेल्या सायंदेवाची आपल्याबरोबर येण्याची उत्सुकता जाणून श्रीगुरू म्हणाले, हे ब्रह्मश्री, तूं माझा दास आहेस. तुला तुझे अभीप्सित मिळेल. आणखी सोळा वर्षांनी तुला माझे

**ईदृश्योऽलौकिका लीलाः कृता भक्तिविधित्सया । भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु ।।४९।।**
**लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः । लौकिकानन्दजनकां चमत्कृतिमिहाकरोत् ।।५०।।**
**हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम् । भजनादेव निर्धूत-मला यान्ति मुमुक्षुताम् ।।५१।।**
**ततोऽभ्यासाच्च वैराग्यात्तं ध्यायन्त उपासते । महाप्रसादोऽनेनैव लभन्ते सद्गुरोर्नताः ।।५२।।**

ईदृश्याः अलौकिकाः लीलाः भक्ति+विधित्सया कृताः। कथं अपि लोका मां भजेयुः इति तु अस्य आशयः।४९। अनेन हेतुना तत् लोका भगवत्+पदं भजन्ति। भजनात् एव निर्धूत+मलाः मुमुक्षुतां यान्ति।५०। लोके प्रति+उपकारित्वं समीक्ष्य भगवान् विभुः इह लौकिक+आनंद+जनकां चमत्कृतिं अकरोत्।५१। ततः अभ्यासात् वैराग्यात् च तं ध्यायन्तः उपासते। अनेन एव नताः सद्गुरोः महाप्रसादः लभन्ते।५२।

दर्शन होईल. असे आश्वासन त्याला देऊन श्रीगुरू (परळी) वैद्यनाथाला जाऊन गुप्तपणे राहिले.४८. अशा अलौकिक दिव्य लीला श्रीगुरूंनी भक्तिमार्गाच्या संस्थापनेसाठी केल्या. त्यांचा हेतु हाच की स्नेहाने वा लोभाने, कशाही प्रकारे लोकांनी आपली भक्ती करावी.४९. आपल्या (भगवंताच्या) भजनावीण लोकांना मोक्षाची योग्यता येणार नाही; आणि त्यांना तर भजनांत अजिबातच रस नाही. त्यामुळे त्यांच्या सांसारिक इच्छा पुरवून त्यांच्यांतील प्रत्युपकाराची भावना जागवावी आणि अशा रीतीने तरी त्यांना आपल्या भक्तीला लावावे यासाठीच त्यांना सुखविणारे चमत्कार तो सर्वव्यापी भगवंत करीत असतो.५०. या निमित्ताने ते लोक सगुण परमात्म्याची अर्चन, वन्दन (*श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।*) आदि नऊ प्रकारे (१) **सकाम भक्ती** करतात. या भक्तीच्या प्रभावाने त्यांच्या चित्तांतील मल नाहीसे होऊन त्यांच्या ठिकाणी मुक्तीची इच्छा (२. **मुमुक्षा**) निर्माण होते.५१. त्यानंतर मुक्तीसाठी प्रयत्नशील झालेला तो (३) **साधक** अभ्यास आणि वैराग्य धारण करून त्या भगवंताचे चिंतन करीत त्याची उपासना करतो. उपासना याचा अर्थ तत्परता. संसारांत जसे आपण 'मी येतो, मी

**ऐक्यज्ञानं तदा लब्ध्वा महावाक्येन चात्मनोः । शान्तिं विनिहिताविद्यास्तत्संस्थां यान्ति ते ध्रुवाम् ।।५३।।**
**प्रसन्नात्मानः प्रशान्ता निर्बन्धा द्वैतवर्जिताः। स्वात्मारामाश्चरन्त्यत्र जडोन्मत्तपिशाचवत् ।।५४।।**

तदा ते महावाक्येन च ऐक्यज्ञानं लब्ध्वा वि+नि+हता+अविद्याः तत्+संस्थां ध्रुवां शान्तिं यान्ति।५३। द्वैतवर्जिताः निर्बन्धाः प्रसन्न+आत्मानः प्रशांताः स्वात्मारामाः अत्र जड+उन्मत्त+पिशाच+वत् चरन्ति।५४।

जातो, हा माझा देह आहे, हे माझे घर आहे' असा सतत आस्थेने व्यवहार करतो आणि मग त्याचाच अध्यास दृढ होत जातो. त्याचप्रमाणे जर 'मी ब्रह्म आहे' अशी आस्था निरंतर ठेवून त्याचप्रमाणे व्यवहार करण्याचा अभ्यास करणे हीच उपासना. ह्या उपासनेने आपण देह आहोत अशा ज्ञानाचा निरास करणारे (देहात्मज्ञानबाधक), देहात्मज्ञानासारखे 'मी ब्रह्म आहे' असे आत्मज्ञान सुलभ होते. ह्याच **उपासने**ने (४) सद्गुरूंचा महाप्रसाद होतो.५२. म्हणजेच शब्दज्ञान आणि अपरोक्षज्ञान यांत निष्णात असलेले कृपासागर सद्गुरू महावाक्याचा उपदेश (५. **श्रवण**) करतात. 'तो तूं आहेस' या महावाक्यातील भागत्यागलक्षणेच्या लक्षित अर्थाच्या अनुसंधानात्मक (५) **मनना**ने आणि (६) **निदिध्यासना**ने अविद्येचा तिच्या कार्यासहित (प्रपंचासहित), विशेष (**वि**) आणि (**नि**) समूळ नाश (**हता**) करून साधक-भक्त प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अखंडरस ऐक्य अनुभवतो. म्हणजेच अपरोक्षज्ञानाच्या प्राप्तीने स्वात्मरूपांत विलीन होतो. आणि त्या आत्मज्ञानांतील पुनरावृत्तिरहित, निर्वाणलक्षण शांती पावतो. निरतिशय आनंदघन चैतन्यांत निरंतर डुबून राहतो.५४.

शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यांत (१:१:४) स्पष्ट केल्याप्रमाणे ब्रह्मभावांत स्थिरावल्यावर तो पूर्वीसारखा संसारी राहत नाही; पूर्वीसारख्या संसारी माणसाला ब्रह्मज्ञान झालेले नसते. जीवन्मुक्ताला आपले असे कुणी राहत नाही वा तो कुणाचाही राहत नाही. यावर कुणी म्हणतील की, 'मग लौकिक, वैदिक सर्वच कर्मांचा लोप होऊन त्याला प्रत्यवाय

दोष लागणार नाही का?' पण त्याला 'मीच ब्रह्म आहे' असा आनंदपूर्ण अद्वैत बोध झाला असल्याने तो कृतकृत्य होतो (परमहंसोपनिषत् ९). आत्मा आणि परमात्मा यांच्या एकत्वाच्या ज्ञानाने होणारा भेदाचा भंग हीच संध्या तिचे आत्मसमाधीतच आचरण करावे असे उपनिषदाचे प्रतिपादन आहेत. श्रीमद्भगवद्गीतेतही (३:१७) म्हटलेले आहे, जो आत्म्यांतच रमलेला आहे आणि आत्मानंदाने तृप्त होऊन आत्म्यामध्येच संतुष्ट आहे त्याला कांहीही करावयाचे राहत नाही.' योगवासिष्ठांतच (५:७७:२९) जीवन्मुक्ताची लक्षणे सांगतांना सूर्य शीतल झाला, चंद्रमंडल उष्ण झाले किंवा अग्नीच्या ज्वाळा खालच्या दिशेने जरी पसरल्या तरी जीवन्मुक्ताला आश्चर्य वाटत नाही असे सांगितले आहे. *('अपि शीतरुचावर्के उष्णे पीयूषमण्डले। अप्यधःप्रसरत्यग्नौ जीवन्मुक्तो न विस्मयी।।')* साहजिकच तो इतरांना जड (मंदमति), उन्मत्त (वेडा) किंवा पिशाच यांच्यासारखा वाटतो. वर वर्णन केल्यानुसार त्याच्या मनांतील द्वैतभावच लोपलेला असल्याने ज्ञानाच्या पूर्वीचे प्रापंचिक व्यवहार लोप पावतात.

*'योगभूमिः - शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता। विचारणा द्वितीया स्यात्तृतीया तनुमानसा। सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यादसंसक्तस्तु पञ्चमी। पदार्थाभावनी षष्ठी सप्तमी तुर्यका स्मृता। आद्यत्रयं जागरतं साधकस्य प्रकीर्तितम्। तुर्या स्वप्नः साधकोऽत्र प्राज्ञैर्ब्रह्मवदुच्यते। निद्रा तु पञ्चमी ब्रह्मवद्वरोऽत्र उच्यते। षष्ठी तु गाढनिद्रा स्याद्वरीयानत्र स स्मृतः। ज्ञेयं परत उत्थानमस्य भावितचेतसः। अन्त्या तुरीयात्र ब्रह्मवद्वरिष्ठो महामतः। स्वतो वा परतो वाऽस्य व्युत्थानं नैव कर्हिचत्, इति।'*

**योगभूमिका -** यांनाच ज्ञानभूमिका असेही म्हणतात, योगवासिष्ठाच्या उत्पत्तिप्रकरणांत ११८व्या सर्गांत वर्णिलेल्या आहेत. क्षणभंगुर, आभासमात्र, पराधीन ऐंद्रिय उपभोगांचा वीट येऊन नित्य, शाश्वत, निरतिशय आणि स्वतंत्र अशा स्वात्मसौख्याची इच्छा होणे आणि त्यासाठी शास्त्र आणि सतंसंग यांच्याकडे प्रवृत्ती होणे ही (१) **शुभेच्छा** नांवाची

पहिली ज्ञानभूमिका होय. इंद्रियांपासून विरक्त होऊन शास्त्रांचा अभ्यास करणे, सज्जनांच्या संगतीत सदाचारपूर्वक श्रवण-मनन घडूं लागले की दुसरी (२) **विचारणा** नांवाची भूमिका सिद्ध झाली असे समजायला हरकत नाही. या दोन भूमिकांचा अभ्यास प्रगाढ होऊन इंद्रिये विषयापासून परावृत्त होऊं लागली, अनासक्ती मनांत स्थिरावली की तिसरी (३) **तनुमानसा** ही भूमिका प्राप्त होते. पहिल्या तीन भूमिकांत साधकाची जागृतावस्था असते. त्याला बाह्य जगताचे पूर्ण भान असते. या तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासाने विषयांपासून पूर्णपणे विरक्त झालेले मन (वशीकरणसंज्ञा वैराग्य) सच्चिदानंद आत्मस्वरूपांत स्थिर झाले की चौथ्या (४) **सत्त्वापत्ती** नांवाच्या भूमिकेवर योगी आरूढतो. ह्या भूमिकेतील योगी ब्रह्मवित् (ब्रह्मज्ञानी) म्हणविला जातो. ह्या तुर्या किंवा समाधी अवस्थेत साधकाला बाह्य जग स्वप्नवत् होते. ही ब्रह्मज्ञानाची पहिली अवस्था आहे. या चार भूमिकांच्या दृढ अभ्यासाने साधक आत्मस्वरूपांत रमून जातो आणि बाह्य जगताचे त्याला भान नसते. हीच पांचवी (५) **असंसक्ती** भूमिका आहे. ही साधकाची निद्रा आहे. ह्या योग्याला ब्रह्मविद्वर असे म्हणतात. सहाव्या भूमिकेत योगी बाह्य जगताचा संबंध संपूर्णपणे तुटल्याने योग्याला जगांतील पदार्थांचे भान राहत नाही. ह्या (६) **पदार्थाभावनी** स्थितीतील योग्याला (**ब्रह्मविद्वरीयान्**) समाधीतून उठविण्यासाठी दुसऱ्या कुणाच्या तरी प्रयत्नांची आवश्यकता असते (**परतो व्युत्थान**). यानंतरची चरम ज्ञानभूमिका (सातवी किंवा ज्ञानी पुरुषांची चौथी श्रेणी - **तुरीया**) प्राप्त झालेला योगी अखंड समाधीत मग्न असतो. तिच्यांतून तो स्वतःच्या वा दुसऱ्याच्या प्रयत्नांनीही भानावर येत नाही. हा ब्रह्मविद्वरिष्ठ होय.

**स्पर्शेक्षाकीर्तनादीनां सद्गुरोर्महिमा त्वियान् । स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वापि धत्ते यत्र मनोऽचलम् ।।५५।।**
**तत्सारूप्यं स पेशस्कृद्ध्यानात्कीट इवैत्यरम । इत्याद्या मार्गणोपाया हरेः स्युः सुलभा नृणाम् ।।५६।।**
**मृग्योऽसौ पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः । नानुमानैरतो युक्त आत्मैवात्मगुरुः किल ।।५७।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भूतेशोऽन्तर्दधे कस्मात्तेजस्वी भक्तवत्सलः । शिष्यास्तस्थुस्तदा कुत्र तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।५८।।**

सद्गुरोः स्पर्श+ईक्षा+कीर्तन+आदीनां इयान् महिमा। स्नेहात् द्वेषात्, भयात् वा अपि यत्र मनः अचलं धत्ते।५५। स पेशस्कृत्+कीट इव तत्+सारूप्यं एति। इति+आद्याः हरेः मार्गण+उपायाः नृणां सुलभाः।५६। असौ पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः। न अनुमानैः। अतः आत्मा एव आत्म+गुरुः युक्तः किल।५७। नामधारक उवाच। तेजस्वी भक्तवत्सलः भूतेशः कस्मात अन्तर्दधे? तदा शिष्याः कुत्र तस्थुः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।५८।

एवढा सद्गुरूंच्या स्पर्श, दर्शन, कीर्तन इत्यादिकांचा महिमा आहे. व्रजगोपिकांप्रमाणे प्रेमाने, शिशुपालादिकांप्रमाणे द्वेषाने किंवा कंसादींप्रमाणे भयाने जिथे कुठे कुणीही अभ्यास-वैराग्यांनी मन स्थिर करील,५५. त्याला ध्येय वस्तूचे सारूप्य प्राप्त होते. कुंभारीण माशीच्या चिंतनाने जसे अळीलासुद्धां पंख फुटून तिची कुंभारीण माशीच होते तसेच हे आहे. असे हे परमात्म्याच्या प्राप्तीचे उपाय मानवमात्रांना सहज उपलब्ध आहेत. यासाठी जाती, वय, लिंग इत्यादींचा कांही नियम नाही.५६. ह्या भगवंताचा नरजन्मांतच बुद्धी इत्यादि साधनांनी शोध घ्यायचा आहे. मात्र केवळ तर्काने तो सांपडणार नाही. यासाठी आपणच आपले गुरू असतो हे खरोखर योग्यच आहे.५७. नामधारक विचारतात - तेजःपुंज आणि भक्तवत्सल असे भगवान कां बरे गुप्त झाले? आणि मग शिष्यवर्ग कुठे राहिला? हे सर्व जाणण्यास मी सादर आहे.५८.

### ।। सिद्ध उवाच ।।

**सर्वे शिष्या भविष्याम इति मत्वात्र यान्त्यतः । मत्वा स्थेयं रह इति छात्रान्सद्गुरुरब्रवीत् ।।५९।।**
**लब्ध्वा द्विजत्वं संस्कारैर्ब्रह्मचारी पठन्त्रयीम् । द्वादशाब्दं कृती सूत्र-मेखलाजिनदण्डधृक् ।।६०।।**
**सायं प्रातः स कर्माग्नि-कार्यं भिक्षां चरन्गुरुम । भजन्भक्त्याऽस्वपन्नह्नि याचितां गुरवेऽर्पयन् ।।६१।।**
**तद्दत्तभुग्लब्धविद्यः स्नायाद्दत्वा वरं व्रती । अनाश्रमी न तिष्ठेत भवेत्स प्रत्यवाय्यतः ।।६२।।**

सिद्ध उवाच। 'सर्वे शिष्या भविष्यामः इति मत्वा अत्र यान्ति अतः रह स्थेयं' इति मत्वा सद्गुरुः छात्रान् अब्रवीत्।५९। संस्कारैः द्विजत्वं लब्ध्वा ब्रह्मचारी कृती सूत्र+मेखला+अजिन+दण्ड+धृक् द्वादश+अब्दं त्रयीम् पठन्।६०। तत्+दत्त+भुक् लब्ध+विद्या व्रती वरं दत्वा स्नायात्। अनाश्रमी न तिष्ठेत। सः प्रत्यवायी भवेत्।६१। सः सायं प्रातः कर्म, अग्नि+कार्यं, भिक्षां चरन् गुरुं भक्त्या भजन्, अह्नि अस्वपन्, याचितां (भिक्षां) गुरवे अर्पयन्।६२।

केवळ आपल्या भजनानेच शिष्याचा उद्धार करण्याचे सामर्थ्य असूनही परंपरेचे रक्षण करण्यासाठी तसेच शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी भगवंत गुप्त झाले हे स्पष्ट करण्याच्या हेतूने सिद्धमुनी उत्तर देतात. 'सगळे - अधिकारी आणि अनधिकारीही, 'आपणही शिष्य होऊं' या अशा विचाराने आपल्याकडे येतील तरी एकांतवास स्वीकारावा' असा विचार करून सद्गुरू शिष्यांना म्हणाले.५९.

**ब्रह्मचर्याश्रम -** कर्मकांडांत पुढे सांगण्यांत येणाऱ्या कर्मांनी द्विजत्व प्राप्त करून यज्ञोपवीत (जानवे), मेखला (कडदोरा), कृष्णाजिन आणि दंड धारण करणाऱ्या कुशल ब्रह्मचाऱ्याने बारा वर्षे ऋक्, यजु आणि साम या वेदत्रयीचे पठण करावे. त्रयी या स्त्रीलिंगी शब्दाचा अमरकोशांत (१:६:३) हाच अर्थ दिला आहे.६०. अशा रीतीने सद्गुरूंच्याकडून विद्या संपादन केल्यावर त्यांना गुरुदक्षिणा देऊन समावर्तन करावे. आश्रमाविरहित राहू नये; कारण त्याने प्रत्यवाय दोष लागतो.६१. त्याने सकाळ-संध्याकाळ संध्यावंदनादि नित्यकर्मे, अग्निसाठी समिधा आणणे इत्यादि कर्मे तसेच भिक्षा यांचे आचरण करावे, दिवसां झोपू नये आणि आणलेली भिक्षा गुरूंना अर्पण करावी.६२.

**स्नातकस्तूद्वहेद् भार्यां गृह्यं परिचरेद् गृही । पोष्यभृद्यज्ञकृद्वेद-शास्त्रधर्मपरो भवेत् ।।६३।।**
**पुत्रार्पितश्रीर्भार्यायुगग्राम्यविषयो वने । यतात्माऽकृष्टपच्याशी यावच्छुद्ध्यन्तरं वसेत् ।।६४।।**
**स्वारोपिताग्निः स वान-प्रस्थो भार्याज्ञयाऽममः । प्रव्रजेद्यतिधर्मज्ञो विरक्तस्तु कुतोऽपि हि ।।६५।।**

स्नातकः तु भार्यां उद्वहेत्। गृही गृह्यं परिचरेत्। पोष्य+भृत् यज्ञ+कृत् वेद+शास्त्र+धर्म+परः भवेत्।६३। पुत्रार्पित+श्रीः भार्या+युक् अग्राम्य+विषयः यतात्मा अकृष्ट+पच्य+आशी यावत् शुद्धि+अन्तरं वने वसेत्।६४। सः वानप्रस्थः स्व+आरोपित+अग्निः भार्या+आज्ञया अममः यति+धर्मज्ञः प्रव्रजेत्। विरक्तः तु कुतः अपि।६५।

**गृहस्थाश्रम -** विद्येत न्हालेला किंवा व्रताने शुद्ध झालेला किंवा दोन्ही तो स्नातक. सोडमुंज झाल्यावर भार्येचे पाणिग्रहण करावे. इथे 'तु' शब्दाने गृहस्थाश्रम ऐच्छिक असल्याचे सुचविलेले आहे. सामर्थ्य असेल तर नैष्ठिक ब्रह्मचर्य स्वीकारावे अशा अर्थाचे स्मृतिवचन आहे. गृहस्थाने आपल्या गृह्यसूत्रानुसार धर्माचरण करावे. यांत अग्निपरिचर्येचाही समावेश जाणावा. मुंडकोपनिषदांत (१:२:३) सांगितल्याप्रमाणे, अग्निहोत्र, दर्श, पौर्णिमास, आग्रयण, चातुर्मास, वैश्वदेव इत्यादि होम न करणाऱ्या किंवा विधीशिवाय होम करणाऱ्या आणि अतिथींचा सत्कार न करणाऱ्याचे सातही लोक नाश पावतात. याच अभिप्रायाने गृहस्थाने पोष्यांचे पोषण करावे आणि यज्ञांचे अनुष्ठान करावे असे म्हटले आहे. त्याने वेद आणि शास्त्रांत पुरस्कारलेल्या धर्माचे परिपालन करावे. कर्मकांडांत हा विषय अधिक स्पष्ट होणारच आहे.६३. **वानप्रस्थाश्रम -** गृहस्थाश्रमाचा समारोप करून सर्व संपत्ती पुत्राला देऊन, भार्येसह किंवा एकट्यानेच ग्राम्य विषयांचा त्याग करून, मनाचे नियमन करून, शेतीतून पिकवलेल्या धान्याशिवाय इतर आहार ग्रहण करून चित्तशुद्धी होईपर्यंत वनांत राहावे.६४. **संन्यासाश्रम -** (चित्तशुद्धीनंतर) त्या वानप्रस्थाने अग्नीचा समारोप करून भार्येच्या संमतीने निर्मम होऊन यतिधर्माचे ज्ञान करून घेऊन संन्यास ग्रहण करावा. यति म्हणजे इंद्रियांवर विजय मिळवलेला. हा क्रम वैराग्याच्या अभावी सांगितलेला आहे. वैराग्य उत्पन्न झाले तर ब्रह्मचर्याश्रमांतून किंवा गृहस्थाश्रमांतूनही संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. ज्या दिवशी विरक्ती उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास घ्यावा असे जाबालोपनिषदाचे (४) वचन आहे. हि शब्दाच्या योजनेतून आचार्यादिकांच्या उदाहरणावरून हे प्रसिद्धच असल्याचे सुचविले आहे.६५.

**त्रिकालस्नायी संन्यासी न्यस्तसूत्रशिखैषणः । जपभिक्षाटनध्यान-शौचार्चनरतो वशी ।।६६।।**
**स्त्रीकथालौल्ययानाहः-स्वापखट्वाऽस्पृगात्मदृक् । सद्वेणुमृद्दार्वलाबु-मयभाजनदण्डधृक् ।।६७।।**
**सकृदह्न्याप्तसद्भिक्षा-भुक्शान्तस्तत्त्वचिन्तकः । तीर्थान्यटन्नृते वर्षास्त्र्यहमेकस्थले वसन् ।।६८।।**
**स्थिरीकृतमनाः क्वापि ततस्तिष्ठन्सुखी भवेत् । अशक्तस्तु महाक्षेत्रे हरिं ध्यायन्वसेत्सदा ।।६९।।**

त्रिकालस्नायी संन्यासी। न्यस्त+सूत्र+शिखा+एषणः जप+भिक्षा+अटन+ध्यान+शौच+अर्चन+रतः वशी।६६। स्त्रीकथा+ लौल्य+यान+अहः+स्वाप+खट्वा+अस्पृक् आत्म+दृक् सत्+वेणु+मृत्+दारु+अलाबु+मय+भाजन+दण्ड+धृक् ।६७। सकृत्+अह्नि+ आप्त+सत्+भिक्षा+भुक् शान्तः तत्त्व+चिन्तकः वर्षाः ऋते तीर्थानि अटन् त्रि अहं एक+स्थले वसन्।६८। स्थिरी+कृत+मनाः ततः क्व अपि तिष्ठन् सुखी भवेत्। अशक्तः तु हरिं ध्यायन् सदा महाक्षेत्रे वसेत्।६९।

तीन वेळां स्नान करण्याचा नियम कुटीचक आणि बहूदक यांना लागूं आहे. हंस संन्याशाने एकदांच स्नान करावे आणि परमहंसाला कांहीच नियम नाही (नारदपरिव्राजक उ. ४:२३). संन्यासाचे दोन प्रकार - पहिला विद्वत्संन्यास आणि दुसरा विविदिषासंन्यास. जानवे, शेंडी आणि तीन एषणांचा त्याग केल्याने होणाऱ्या विविदिषा संन्यासाने कृतकृत्यता प्राप्त होते. म्हणून त्याचे धर्म पुढे सांगितले आहेत. जितेंद्रिय होऊन प्रणवाचा जप, भिक्षा, संचार, ध्यान, शौच आणि देवपूजा ह्या कर्मात त्याने निमग्न राहावे.६६. स्त्रियांच्या गोष्टी, इंद्रियांचे लाड, वाहन, दिवसा झोप आणि खाट (पलंग) यांना स्पर्शही करू नये. आत्म्याच्या चिंतनात राहावे. चांगल्या वेळूचा, मातीचा, लांकडाचा किंवा भोपळ्याचा कमंडलु तसेच दंड धारण करावा.६७. दिवासांतून एकच वेळ मागून आणलेली शुद्ध भिक्षा ग्रहण करावी. माधुकरी, तात्कालिक, किंवा अयाचित यांसारखी भिक्षा चांगली समजावी. पावसाळ्याचे दिवस सोडून (चातुर्मास, आषाढ शुद्ध पौर्णिमा ते भाद्रपद शुद्ध पौर्णिमा हे दोन महिने संन्याशांचा चातुर्मास असतो.) सतत तीर्थयात्रा करावी. एका गांवी तीन दिवसांपेक्षां अधिक राहूं नये.६८. मन स्थिर झाल्यावर - निर्बीजसमाधीची प्राप्ती झल्यानंतर मग कुठेही राहून सुखी व्हावे. **सुखी** म्हणजे बुद्धिग्राह्य अतींद्रिय स्वात्मसौख्यांत रमून राहावे. अशक्ताने मात्र सतत ईश्वराचे ध्यान करीत काशी आदींसारख्या महाक्षेत्रांत राहावे.६९.

**तस्मात्कृध्वं स्वाश्रमार्हं कृत्यं पातोऽन्यथा भवेत् । इत्युक्त्वान्यान्प्रेरयित्वा गृहेभ्योऽजोऽब्रवीद्यतीन् ।।७०।।**
**काशी प्रयागो गया च श्रीरङ्गः पुरुषोत्तमः । श्रीशैलो नैमिषारण्यं कुरुक्षेत्रं बदर्यपि ।।७१।।**
**गोकर्णः शङ्खकर्णश्च काञ्च्ययोध्या च गोकुलम् । मथुरा द्वार्वती मायावंतिका करवीरपूः ।।७२।।**
**गन्धर्वपूर्हरिहर-क्षेत्रं सद्देवकन्यका । गुहाश्रमः सेतुबन्ध इत्यादिक्षेत्रविस्तरः।।७३।।**

तस्मात् स्व+आश्रम+अर्हं कृत्यं कृध्वम्। अन्यथा पातः भवेत्। इति उक्त्वा अन्यान् गृहेभ्यो प्रेरयित्वा अजः यतीन् अब्रवीत्।७०। काशी, प्रयागः, गया च श्रीरङ्गः, पुरुषोत्तमः, श्रीशैलः, नैमिषारण्यं, कुरुक्षेत्रं, बदरि अपि;।७१। गोकर्णः, शङ्खकर्णः, काञ्ची, अयोध्या, च गोकुलम्, मथुरा, द्वार्वती, माया, अवंतिका, करवीरपूः,।७२। गन्धर्वपूः, हरिहर+क्षेत्रं, सत्+देवकन्यका, गुहाश्रमः, सेतुबन्धः इत्यादि क्षेत्रविस्तरः।७३।

हे सर्व आपापल्या आश्रमाला योग्य असे कर्म तुम्ही सर्वांनी करावे. अन्यथा प्रत्यवायाचा दोष लागून अधःपात होतो, असे जन्मादिविकारातीत श्रीगुरूंनी सर्वांना सांगून आपापल्या घरी त्यांना पाठविले. याला प्रमाण म्हणून मनुस्मृतीचा पुढील श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. *'अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसज्जञ्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति।।११:४४।।'* (विहित कर्माचा त्याग करून विषयांच्या आसक्तीने निंद्य कर्म आचरणारा पुरुष पतन पावतो.) इतर सर्व आश्रमांतील पतितांना प्रायश्चित्ताने शुद्धी होऊ शकते. संन्यासाश्रमांतून पतन पावलेल्याला मात्र प्रयत्नाने कदाचित् आमुष्मिकी (परलोकांत) शुद्धी असली तरीही इहलोकांत प्रायश्चित्ताचे विधान कुठेही शास्त्रांत सांपडत नाही. तो देहाने आमरण अशुद्धच राहतो. शास्त्र आणि रूढी या दोन्ही पक्षी तो बहिष्कृतच ठरतो (ब्रह्मसूत्र ३:४:४३). त्याचप्रमाणे नैष्ठिक ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेल्यालाही प्रायश्चित्त नाही (अत्रिस्मृति ८:१६). त्यालाही कदाचित् आमुष्मिकी शुद्धी असेलही; पण शास्त्रदृष्ट्या भ्रष्ट झाल्याने व त्यासाठी दैहिक प्रायश्चित्ताचे विधान नसल्यामुळे तो पतितच राहतो (ब्रह्मसूत्र ३:४:४१). खालच्या आश्रमांतून वरच्या आश्रमांत चढतां येते;

**गङ्गासरस्वत्यर्कोत्था विपाट्पौष्णी मरुद्वृधा । वितस्तासिक्न्यनेकास्या चन्द्रभागा पयस्विनी ।।७४।।**
**शरावती मधुमती रेवा गोदाऽमरोद्भवा । सरयू कौशिकी पूर्णा भीमा कृष्णा मलापहा ।।७५।।**
**कावेरी प्रवरा तुङ्गा क्षिप्रा तापी च वेदिका । चर्मण्वती गण्डकीति पूर्वा नद्यो नदा अपि ।।७६।।**
**तत्संगमा अप्यघघ्नास्तीर्थान्यन्यान्यनेकशः । तीर्थानि गुरुसंचाराच्छश्वद्द्वादशसिन्धुषु ।।७७।।**

गङ्गा, सरस्वती, अर्क+उत्था, विपाट्, पौष्णी, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी, अनेकास्या, चन्द्रभागा, पयस्विनी।७४। शरावती, मधुमती, रेवा, गोदा, अमर+उद्भवा, सरयू, कौशिकी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलापहा।७५। कावेरी प्रवरा, तुङ्गभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इतिपूर्वा नद्यः, नदा अपि।७६। तत् संगमा अपि अघघ्नाः अन्यानि अनेकशः तीर्थानि। गुरु+संचारात् द्वादश सिन्धुषु,।७७।

पण वरच्या आश्रमांतून खालच्या आश्रमांत उतरतां येत नाही. निम्न आश्रमांत अवरोहण करण्याला आसक्तीच कारण आहे. ही आसक्तीच मिथ्या ज्ञानांतून उद्भवलेली असल्याने निषिद्ध आहे (ब्रह्मसूत्र ३:४:४०). नंतर ते आपल्या संन्यासी शिष्यांना तीर्थांचे परिभ्रमण करायला सांगतात.७०.

**तीर्थयात्रा -** काशी, प्रयाग, गया, श्रीरंगपट्टण, पुरुषोत्तम, श्रीशैल्य, नैमिषारण्य, कुरुक्षेत्र, बदरिनाथ, गोकर्ण, शंखकर्ण, कांची, अयोध्या, गोकुळ, मथुरा, द्वारका, हरिद्वार, उज्जैन, कोल्हापूर, गाणगापूर, हरिहर, कन्याकुमारी, कार्तिकस्वामी, रामेश्वर आणि इत्यादि शब्दांतून प्रभास, सिद्धपूर आदि क्षेत्रांचा निर्देश समजावा.७१-७३. गंगा, सरस्वती, यमुना, व्यास (बियास), रावी, मरुवर्मन, झेलम, चिनाब, सहस्रमुखी, चन्द्रभागा, पयस्विनी,७४. शरावती, मधुमती, गोदा, अमरजा, शरयू, कोसी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलप्रभा,७५. कावेरी, प्रवरा, तुंगभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इत्यादि नद्या आणि शोणभद्रादि नदसुद्धां (समुद्राला न मिळतां भूमीवरच संपणारे जलप्रवाह).७६. तसेच त्यांचे संगमही पापनाशक आहेत. पुष्कर, मानस, बिन्दु अशी इतर अनेक तीर्थे आहेत. गुरूच्या संचारानुसार तीर्थे बारा नद्यांत वास करतात. सिंहेला गुरू असतांना गोदावरी, कन्येला असतां कृष्णा, तुळेला असतां मलप्रभा, इत्यादि.७७.

**प्रचरन्ति सदा तास्तु स्वर्णदीस्नानपुण्यदाः । कृध्वं स्नानादि विधिवत्सर्वत्रात्र सरःस्वपि ।।७८।।**
**ग्रीष्मे रजस्वला नद्यो यद्दिनेऽम्बु नवं तदा । दशाहं नर्ते तीरस्थैः स्नानं मुख्यासु तु त्र्यहम् ।।७९।।**
**द्युरात्रमपि कूपादौ चरित्वैवं ततोऽखिलाः । श्रीशैलं बहुधान्येऽब्दे यात यास्याम्यहं ह्यपि ।।८०।।**

तीर्थानि प्रचरन्ति। तदा तु ताः स्वर्णदी+स्नान+पुण्यदाः। अत्र सर्वत्र सरःसु अपि विधिवत्, स्नानं कृध्वम्।७८। ग्रीष्मे यत् दिने अम्बु नवं तदा नद्यः रजस्वलाः। ऋते तीरस्थैः दशाहं, मुख्यासु त्र्यहं स्नानं न (कार्यम्)।७९। कूपादौ अपि द्युरात्रम्। एवं चरित्वा ततः अखिलाः बहुधान्ये अब्दे श्रीशैलं यात। हि अहं अपि यास्यामि।८०।

(**अर्कोत्था** = यमुना, **विपाट्**(श्) = बियास; **पौष्णी** (पुरुष्णी) = रावी; **मरुद्वृधा** = मरुवर्मन; **वितस्ता** = झेलम; **असिक्नी** = चिनाब; **कौशिकी** = कोसी)

त्या काळांत त्या नद्यांत स्नानाचे पुण्य गंगास्नानापेक्षांही अधिक आहे. ह्या सर्व तीर्थांत तसेच निरनिराळ्या सरोवरांतही सर्वांनी विधिपूर्वक स्नान, दान, श्राद्ध, ब्राह्मणभोजनादि कर्मे करावीत. महानदी आणि महाक्षेत्रांच्या ठिकाणी क्षौर करावे. सर्वत्र करण्याची आवश्यकता नाही.७८. आषाढ महिन्यांत जेव्हां नदीला नवीन पाणी येईल त्या वेळी त्या दहा दिवस रजःस्वला होतात. त्या काळांत तीरस्थांखेरीज इतरांनी दहा दिवस नदीवर स्नान करूं नये. महानदीसाठी हा काळ फक्त तीनच दिवसांचा आहे. कांही जणांच्या मते महानदींना रजस्वलत्व नाही.७९. आड, विहीर, तलाव इत्यादींनाही दोन दिवसांचे रजस्वलत्व पाळावे. अशी सर्व तीर्थयात्रा पूर्ण करून, 'बहुधान्य संवत्सराला सर्वांनी श्रीशैल्याला यावे. आपणही त्या वेळी तिथे येऊं' असे श्रीगुरूंनी सर्वांना सांगितले.८०. अशा रीतीने सर्व शिष्यवर्गांना तीर्थयात्रेला जाण्याची आज्ञा श्रीगुरूंनी केली आणि तेही त्यानुसार निघून गेले. मी मात्र श्रीगुरुचरणकमलांचा भ्रमर होऊन तिथेच राहिलो.८१.

**इत्युक्त्वा प्रेरयामास यात्राया अपि ते ययुः । तत्रैव सद्गुरुपद-पद्मालिरभवं त्वहम् ।।८१।।**
**(क्षेपकौ) यद्वर्जुनाभ्यां विद्योगौ प्राहैष प्राग्यथा तथा । गुह्यौ मे प्राह ते शिष्य विनीत कथयामि ते ।।८२।।**
**इत्युक्त्वा प्रणतायोचे सिद्धः शिष्याय सत्तमः । याभ्यां परं पुमान्याति स्वानन्दो वैष्णवं पदम् ।।८३।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे तीर्थयात्रोद्देशो नाम नवमोऽध्यायः ।।९।।**

**सप्ताहपारायणे द्वितीयः । अन्ते रसज्ञा वशा..स्तोत्रम् पठनीयम् । अन्यदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

इति उक्त्वा यात्राया प्रेरयामास। ते अपि ययुः। अहं तु तत्र एव सद्गुरु+पद+पद्म+अलिः अभवम्।८१। यदु+अर्जुनाभ्यां गुह्यौ वित्+योगौ प्राक् यथा प्राह तथा एष मे प्राह। (हे) विनीत शिष्य ते कथयामि।८२। इति उक्त्वा सत्तमः सिद्धः प्रणताय शिष्याय (तौ योगौ) ऊचे याभ्यां पुमान् स्वानन्दो परं वैष्णवं पदं याति।८३।

(शेवटचे दोन श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी क्षेपक म्हटलेले आहेत. त्याचे कारण असे दिसते की ह्यांचा विषय मूळ गुरुचरित्रांतला नाही. सिद्धमुनींनी नामधारकाला दिलेले हे आश्वासन आहे.) सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, 'ह्या दत्तप्रभूंनी यदु आणि कार्तवीर्यार्जुन यांना गूढ अशा ज्ञानमार्ग आणि योगमार्गांचा उपदेश पूर्वींच्या युगांत केला तसाच मलाही केला. हे शिष्योत्तमा, तूही नम्रतादि गुणांनी अधिकारी असल्याने ते मी तुला सांगत आहे'.८२. असे बोलून संतश्रेष्ठ सिद्धमुनींनी गीतेतील प्रतिपादनानुसार प्रणिपात, परिप्रश्न आणि सेवा यांचे अनुष्ठान करणाऱ्या शिष्याला - नामधारकाला, त्या दोन्ही योगांचे निरूपण केले, ज्यांयोगे पुरुष आनंदपूर्ण होऊन त्या परम वैष्णव पदाला पावतो.८३.

**तीर्थयात्रेचे महत्त्व -** *'उत्तमा सहजावस्था मध्यमा योगधारणा। अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाऽधमा।।'* अशी वर्गवारी शास्त्राने केलेली असली तरी महापाप्यांना मात्र प्रायश्चित्तादींच्या अनुष्ठानाने पापक्षय केल्याविना ज्ञान होऊ शकत नाही. 'आरशाचा पृष्ठभाग स्वच्छ केल्यावर त्यांत आपले प्रतिबिंब स्पष्ट दिसावे तसे पापकर्माच्या क्षयाने पुरुषाला

आत्मज्ञान होते; आपल्या चित्तांतच आत्म्याचे दर्शन होते.' (महाभारत, शांतिपर्व २०४:८) या स्मृतिवचनानुसार योग, याग इत्यादींचे अनुष्ठान करण्यास असमर्थ असणाऱ्या मुमुक्षूंना ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापाच्या क्षयासाठी, विवेकी लोकांसाठी कनिष्ठ गणल्या गेलेल्या तीर्थयात्रेचा उपदेश योग्यच आहे. पुरुषांसाठी विहित अशा संस्कारांनी संस्कृत झालेल्या शुद्धचित्तांतच आत्मज्ञान सहजच प्रकाशते. आत्मज्ञानाचा उदय झाल्यानंतर, त्या ब्रह्मानंदाचा रस लाभल्यावरच अभयावस्था लाभते (तैत्तिरीय उ. २:७). त्याला कुणाचीही भीती उरत नाही. पापपुण्य त्याला शिवू शकत नाहीत. अशी नैष्कर्म्यावस्था येते (तैत्तिरीय उ. २:९). त्यापूर्वी पूर्वसंचित पापकर्मांचा क्षय करून विद्येचा प्रादुर्भाव होण्यासाठीच कर्मांची आवश्यकता आहे. ही कर्मे बृहदारण्यकोपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे यज्ञ, दान, तप हीच होत. 'मग इथे तीर्थयात्रेचे निरूपण कसे केले?' अशा शंकेचे निराकरण स्वामिमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे. संसारसागरातून तारून नेणारी किंवा तरणोपाय असणारी ती तीर्थे अशा अर्थाने गंगादि ऋषिजुष्ट (ऋषींनी सेवन केलेल्या) जलांना तीर्थ असा शब्द रूढ झाला आहे. त्या जलांत स्नानादींनी कर्माच्या अनुष्ठानासारखाच पापक्षय होतो. यामुळेच ऋग्वेदांत (१:२३:२२-२३) तसेच तैत्तिरीय आरण्यकांत (१:१) जलदेवतांची प्रार्थना करणारे मंत्र आहेत. योगवासिष्ठांतही श्रीरामप्रभूंच्या तीर्थयात्रेचे वर्णन आलेले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा नववा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## दशमोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**शिष्यांस्तु तीर्थयात्रायै प्रेरयित्वा स्वयं कुह । उवास भगवान्ब्रूहि श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**संवत्सरं वैद्यनाथ-समीपमकरोद्विभुः । निवासमहमप्येतत्पादाब्जभ्रमरोऽभवम् ।।२।।**

**तत्रैत्यैको द्विजो मन्दो नमस्कृत्याब्रवीद्गुरुम् । प्रपद्ये भगवंस्त्वां मे मोक्षोपायमुपादिश ।।३।।**

नामधारक उवाच। शिष्यान् तार्थयात्रायै प्रेरयित्वा तु स्वयं भगवान् कुह उवास? (हे गुरो! मे) ब्रूहि। सादरं श्रोतुं इच्छामि।१। विभुः संवत्सरं वैद्यनाथसमीपं निवासं अकरोत्। अहं अपि तत्+पाद+अब्ज+भ्रमरः अभवम्।२। तत्र एकः मन्दः द्विजः गुरुं नमस्कृत्य अब्रवीत्। (भो) भगवन्! त्वां प्रपद्ये। मे मोक्ष+उपायं उपादिश।३।

श्रीगणेशाय नमः। **दहाव्यांत धौम्यगुरूंच्या शिष्यांची सांगुनी गोष्ट । पश्चात्तप्त द्विजाला करिती श्रीगुरु कृतार्थ ।।१।।** नामधारक विचारतो, सर्व शिष्यांना तीर्थयात्रेला पाठवून स्वतः भगवान कुठे बरे राहिले? मी आदरपूर्वक ऐकायला उत्सुक आहे; तरी आपण मला सांगा. या प्रश्नाच्या उत्तरांतून सिद्ध मुनी वेदांचे एक मर्म नामधारकाला सांगणार आहेत ते हे की गुरूंच्या मुखांतून श्रवण केलेली विद्याच उत्कृष्ट सिद्धीची प्राप्ती करून देते.१. 'प्रभूंनी परळी येथे वैद्यनाथांच्या निकट एक वर्ष वास्तव्य केले. मीसुद्धां त्यांच्या पदकमलांचा भ्रमर होऊन त्यांच्या सान्निध्याचा लाभ घेत होतो.२. तिथे असतांना एक मंदबुद्धी ब्राह्मण श्रीगुरूंना अभिवादन करून म्हणाला, 'हे प्रभो! मी आपल्याला शरण आलो आहे. तरी आपण मला मोक्षमार्गाचा उपदेश करावा.'३.

**मया तु सिद्धये कष्टं भूर्यकारि तथापि मे । नाप्ता सिद्धिर्नोपलब्धः सन्मार्गप्रापको गुरुः ।।४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कथं गुरुं विना वत्स सिद्धये केन योजितः । कस्याज्ञया कृतं कष्टमित्याकर्ण्य द्विजोऽब्रवीत् ।।५।।**

**सिद्ध्यै मया गुरुः कश्चिच्छ्रितश्चण्डः स तु प्रभो । सेवार्थी पीडयामास ततस्त्यक्तः स वै मया ।।६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**हन्तासाधु कृतं धिक्त्वां गच्छेतः सत्वरं यतः । गुरुद्रोह्यास्यावलोको न भद्राय कथंचन ।।७।।**

मया तु सिद्धये भूरि कष्टं अकारि। तथपि मे सिद्धिं न आप्ता। सन्+मार्ग+प्रापकः गुरुः न उपलब्धः।४। श्रीगुरुः उवाच। (हे) वत्स, गुरुं विना केन कथं सिद्धये योजितः? कस्य आज्ञया कष्टं कृतम्? इति आकर्ण्य द्विजः अब्रवीत्।५। मया सिद्ध्यै कश्चित् गुरुः श्रितः। (हे) प्रभो, स तु चण्डः, सेवार्थी, मां पीडयामास। ततः स मया त्यक्तः वै।६। हन्त! असाधु कृतम्। त्वां धिक्। इतः सत्वरं गच्छ, यतः गुरु+द्रोह्यस्य अवलोकः कथंचन भद्राय न।७।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, गुरूवीण कुणी, कशा प्रकारे मोक्षमार्गाला प्रवृत्त केले? आणि तू खूप कष्ट घेतले असे म्हणतोस ते कुणाच्या आज्ञेने? हे प्रश्न ऐकून तो ब्राह्मण सांगूं लागला.४. 'मी सिद्धीसाठी जपतपादि खूप कष्ट केले. तरीही मला ना सिद्धी मिळाली न परमार्थमार्गावर नेणारा गुरू मिळाला! मी मोक्षासाठी एका गुरूचा आश्रय केला होता. परंतु तो अति कोपिष्ट आणि केवळ सेवेची अपेक्षाच करणारा होता. त्याने माझा खूपच छळ केल्यामुळे मी त्याचा त्याग केला.'६. 'अरेरे! तू हे निंदनीय कृत्य केलेले आहेस. आपले दोन्ही कान ब्रह्माच्या यथार्थ निरूपणाने भरून टाकणारा गुरु आपल्या आईवडिलांसारखा असतो. त्याचा कधीही द्रोह करूं नये, असे मनूचे वचन आहे (मनुस्मृति २:१४४). तूं इथून ताबडतोब चालता हो! गुरुद्रोह्याचे तोंड पाहणाऱ्याचे कधीही भले होत नाही! मग त्याच्याशी संभाषणादि करणे तर दूरच.'७.

**प्रणिपातपरिप्रश्न-सेवाधर्मपराङ्मुखे । कुतो गुरुकृपालेशस्तद्वत्येव प्रसन्नता ।।८।।**

**।। द्विज उवाच ।।**

**कथं ज्ञेयः कथं सेव्यो गुरुस्तन्मे वदाखिलम् । अजानता गुरुद्रोहः कृतोऽतो मोद्धर प्रभो ।।९।।**

प्रणिपात+परिप्रश्न+सेवा+धर्म+पराङ्मुखे कुतो गुरुकृपालेशः? तद्वति एव प्रसन्नता।८। द्विज उवाच। गुरुः कथं ज्ञेयः, कथं सेव्यः तत् अखिलं मे वद। अजानता गुरुद्रोहः कृतः। अतो मां उद्धर।९।

**गुरूच्या त्यागाचा निषेध -** मनुस्मृतीत (५७:७) असेही सांगितले आहे की, कार्याकार्याचा विचार न करतां उन्मार्गगामी दोषलिप्त गुरूचाही त्याग करावा. मग छळवादी गुरूचा त्याग केल्याबद्दल त्या ब्राह्मणाला कां निघून जायला सांगितले? या शंकेचे निरसन करण्यासाठी पुढचा श्लोक सांगितला आहे. मनूच्या वचनांत गुरूचाही (*गुरोरपि*) असा शब्दप्रयोग आहे. त्याचा अर्थ असा होतो की दोषत्रयांनी लिप्त असा गुरूसुद्धां त्याज्य किंवा दंड्य आहे. मग इतरांची काय कथा? ह्याने इतरांच्या त्यागाला बळकटी दिलेली आहे. गुरूच्या त्यागाचे समर्थन केलेले नाही. 'प्रसंगी मातृगमन करावे पण गंगेच्या कांठी दान घेऊ नये; पुत्राचे मांस खाल्ले तरी चालेल पण राजाकडून दान घेऊं नये,' इत्यादि वचने मातृगमनाचे किवा पुत्रमांसभक्षणाचे समर्थन करणारी नाहीत तर गंगाप्रतिग्रहाचा आणि राजप्रतिग्रहाचा निषेध करणारी आहेत. अशा वचनांना चोदना मानल्या तर अनर्थ होईल आणि *'चोदनालक्षणो धर्मः'* (मीमांसादर्शन १:१:२) ह्या सूत्राचा विपर्यास होईल. दोषलिप्तही गुरूचा त्याग कधीही समर्थनीय ठरणार नाही; मग उपकारकर्त्या गुरूचा कसा ठरेल? शिवाय इथे तर त्या ब्राह्मणाने सेवेलाच पीडा मानून आळसापोटी गुरूला सोडून दिले आहे. 'शिष्याची योग्यता येण्यासाठी प्रणिपात, परिप्रश्न, सेवा ह्या धर्मांचे पालन करायला हवे. तो गुरू दोषत्रयलिप्त नसतांना त्याचा त्याग केला आहे. तेव्हां अशाचे तोंड पाहूं नये' हे श्रीगुरूंचे म्हणणे योग्यच आहे.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गुरुर्निरुपमः साक्षाद् ब्रह्मविष्णुशिवात्मकः । सोऽज्ञेयस्त्वादृशैरन्धैस्तद्वत्सेवापि सद्गुरोः ।।१०।।**
**एतदर्थं पुरा वृत्तं शृणु धौम्याभिधो मुनिः । द्वापरेऽभूत् त्रयश्छात्रा आसन्तस्याङ्ग तत्पराः ।।११।।**

श्रीगुरुः उवाच। गुरुः निरुपमः। साक्षात् ब्रह्म+विष्णु+शिव+आत्मकः। सः त्वादृशैः अन्धैः अज्ञेयः। तद्वत् सद्गुरोः सेवा अपि (अज्ञेया)।१०। एतत् अर्थं पुरा वृत्तं शृणु। द्वापरे धौम्य+अभिधः मुनिः अभूत्। (हे) अङ्ग, तस्य त्रयः तत्पराः छात्राः आसन्।११।

वरील शिष्यधर्माचे पालन करणाऱ्यालाच गुरूची प्रसन्नता लाभते.८. श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्याचे मनन केल्यावर त्या ब्राह्मणाला स्वतःच्या अपराधाची जाणीव झाली. त्याचे परिमार्जन करण्यासाठी गुरूंना कसे ओळखावे आणि त्यांची सेवा कशा प्रकारे करावी ते तो श्रीगुरूंना विचारीत आहे. श्रीगुरूंविषयीच्या अज्ञानापोटी माझ्याकडून गुरुद्रोह झालेला आहे. तरी हे प्रभो, मला या पापांतून वर काढा.९. यावर श्रीगुरू म्हणाले, 'गुरूंना कशाचीही उपमा देतां येत नाही. ते साक्षात् ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांचे स्वरूप आहेत. तुझ्यासारख्या आंधळ्यांना सद्गुरूंचे किंवा त्यांच्या सेवेचे ज्ञान होऊं शकत नाही.' भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांनी शतश्लोकींत (१) सद्गुरूंचे निरुपमत्व असे प्रतिपादले आहे. आत्मज्ञानाचे दान देणाऱ्या सद्गुरूंना त्रिभुवनांतही दृष्टांत सांपडत नाही. परीसाची उपमा द्यावी तो तो परीस लोखंडाचे सोने करतो, पण त्याला परीसत्व देत नाही. पण सद्गुरू मात्र आपल्या चरणांच्या आश्रयाला आलेल्या शिष्याला आपले साम्यच बहाल करतो. या कारणाने गुरू निरुपम आणि अलौकिक आहेत.' साहजिकच ते ब्रह्मा-विष्णू-शिवस्वरूप ठरतात.१०. याविषयींचा एक इतिहास ऐक. द्वापरयुगांत धौम्य नांवाचा एक मुनि होते. त्यांचे तीन शिष्य होते. ते सेवाधर्माचे ज्ञाते असल्याने गुरुसेवेला तत्पर होते.११.

**बैदारुणोपमन्य्वाख्याः सेवाधर्मसुशिक्षिताः । तेषां परीक्षितुं भावं गुरुः प्राह दयार्द्रधीः ।।१२।।**
**मच्छालेयेऽम्ब्वभावोऽस्ति जीवेत्सस्यमतः कुतः । गत्वा वः कोपि यत्नेन क्षेत्रमम्ब्वानयत्वरम् ।।१३।।**
**श्रुत्वैवमरुणोऽह्नाय गत्वा क्षेत्रसमीपतः । जलमानीय यत्नेन पल्वलात्क्षेत्रमुन्नतम् ।।१४।।**
**दृष्ट्वाऽकरोत्क्षेत्रतुल्यं वारिवारणमाशु तत् । जलप्रवाहः सहसा क्षेत्रादन्यत्र निर्ययौ ।।१५।।**
**न्यस्तोऽपि पाषाणचयः स्थातुं तत्र शशाक नो । मन्ये क्षेत्रे जलाभावाद् गुरुर्मां धिक्करिष्यति ।।१६।।**
**गुर्वर्थमत्र मर्तव्यमिति मत्वोभयत्र सः । स्वाङ्गं निधायोपरिष्टाज्जलैः क्षेत्रमपूरयत् ।।१७।।**

बैद+आरुणि+उपमन्यु+आख्याः सेवा+धर्म+सुशिक्षिताः। तेषां भावं परीक्षितुं दयार्द्रधीः गुरुः प्राह।१२। मत्+शालेये अम्बु+अभावः अस्ति। अतः सस्यः कुतः जीवेत्? वः कः अपि गत्वा यत्नेन क्षेत्रं अम्बु अरं आनयतु।१३। एवं श्रुत्वा अरुणः अह्नः क्षेत्रसमीपतः गत्वा पल्वलात् यत्नेन जलं आनीय, पल्वलात् क्षेत्रं उन्नतं दृष्ट्वा आशु क्षेत्रतुल्यं वारिवारणं अकरोत्। तत् जलप्रवाहः सहसा क्षेत्रात् अन्यत्र निर्ययौ।१५। तत्र न्यस्तः पाषाणचयः अपि स्थातुं न शशाक। (सः) मन्ये क्षेत्रे जल+अभावात् गुरुः मां धिक् करिष्यति।१६। अत्र गुरु+अर्थम् मर्तव्यं इति मत्वा सः उभयतः स्वांगं निधाय उपरिष्टात् जलैः क्षेत्रं अपूरयत्।१७।

त्यांची नांवे बैद, आरुणी आणि उपमन्यु अशी होती. त्यांच्या गुरुभक्तीची परीक्षा करण्यासाठी ते दयाळु गुरू त्यांना म्हणाले.१३. 'माझ्या भातशेतीला पाण्याचा तुटवडा आहे; ते पीक कसे तग धरील? तुम्ही कुणी तरी जाऊन प्रयत्नपूर्वक शेतीला लवकर पाणी पुरवा.'१४. धौम्यमुनींची ही आज्ञा ऐकून आरुणी लगेच शेतीकडे गेला. त्याने तलावांतील पाणी कालवा काढून प्रयत्नपूर्वक शेतीजवळ आणले. पण तळ्यापेक्षा शेती उंच असल्याने पाणी अडवून शेतीच्या वर चढविले. तरीही शेतीतून ते पाणी खाली वाहून गेले.१५. आरुणीने तिथे रचलेले दगडही वाहून गेले. त्याला असे वाटले की शेतीमध्ये पाणी आणले नाही तर गुरू माझा धिक्कार करतील.१६. इथे गुरूंच्या कार्यासाठी मरण आले तरी बेहत्तर असा विचार करून त्याने शेतीच्या बाहेर जाणारा पाण्याचा मार्ग आपल्या शरीरानेच अडविला आणि अशा रीतीने शेत पाण्याने भरून टाकले.१७.

**धौम्योऽपि क्षेत्रमेत्याम्बु-पूर्णं शालेयमीक्ष्य सः । खिन्नः शिष्यमदृष्ट्वैहि वत्सेत्यावाहयन्मुदा ।।१८।।**
**प्रत्युत्तरं जलाक्तान्त-रङ्गो दातुं स न क्षमः । किञ्चिद्ध्वनिं चकारासौ तच्छ्रुत्वैत्य ददर्श तम् ।।१९।।**
**कृपया परयोत्थाप्य भक्तिं ज्ञात्वा स तत्क्षणम । तस्मिन्प्रसन्नः सम्भूय स्वीयं साम्यं व्यधान्मुनिः ।।२०।।**
**विद्याविनयसंपन्नो भूत्वा संतोष्य सद्गुरुम् । तदाज्ञया ययौ धाम स्वमर्च्योऽभवदत्र सः ।।२१।।**
**ततो बैदं गुरुः प्राह सस्यं मे शिष्य सर्वतः । रक्षयित्वानु धान्यं तद्यत्नात्सर्वं समानय ।।२२।।**

धौम्यः अपि क्षेत्रं एत्य शालेयं अम्बु+पूर्णं ईक्ष्य सः शिष्यं अदृष्ट्वा खिन्नः वत्स, एहि, इति मुदा आह्वयत्।१८। परया कृपया (तं) उत्थाप्य (तस्य) भक्तिं ज्ञात्वा सः (गुरुः) मुनिः तस्मिन् प्रसन्नः सम्भूय तत् क्षणं स्वीयं साम्यं व्यधात्।१९। सः (शिष्यः) जलाक्त+अंतरंगः प्रत्युत्तरं दातुं न क्षमः। असौ किञ्चित् ध्वनिं चकार। तत् श्रुत्वा एत्य तं ददर्श।२०। (सः) विद्याविनयसंपन्नो भूत्वा सद्गुरुं संतोष्य तत्+आज्ञया स्वं धाम ययौ। अत्र सः अर्च्यः अभवत्।२१। ततः गुरुः बैदं प्राह, (हे) शिष्य, मे सस्यं सर्वतः रक्षयित्वा अनु तत् सर्वं धान्यं यत्नात् समानय।२२।

इतक्यांत धौम्यमुनीही शेतावर आले आणि रानांत पाणी भरलेले पाहून आनंदित झाले. पण शिष्य कुठे दिसत नाही असे पाहून खिन्नही झाले आणि बाळा, इकडे ये, अशा हांका मारूं लागले.१८. पाण्यांत बुडलेला असल्याने शिष्य त्यांच्या हांकेला प्रतिसाद देऊं शकला नाही. त्याने थोडासा आवाज केला. तो ऐकून गुरू तिथे आले आणि त्यांनी आपल्या शिष्याची अवस्था पाहिली.१९. त्याला तसे पाहून धौम्यमुनींच्या मनांत अत्यंत करुणा उपजली आणि आरुणीची भक्ती त्यांनी जाणली. ते त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला तात्काळ आपल्यासारखे केले.२०. अशा रीतीने विद्या आणि विनय यांनी संपन्न होऊन तसेच त्यांना दक्षिणादानाने संतुष्ट करून, सोडमुंज करून आपल्या घरी गेला. सद्गुरूंच्या प्रसादाने विद्वत्ता प्राप्त करून या लोकांत तो पूज्य झाला.२१. नंतर धौम्यगुरूंनी बैद नांवाच्या दुसऱ्या शिष्याला बोलावून सांगितले, 'बा शिष्या, माझ्या शेतांतील पिकाची चांगली राखण करून मग खळे करून वेगळे केलेले सर्व धान्य प्रयत्नपूर्वक व्यवस्थित घेऊन ये.' **सस्य** म्हणजे शेतांतील कणीस इत्यादि पीक; **धान्य** म्हणजे साळी इत्यादि कोंड्यासह असलेले; **तण्डुल** म्हणजे सडलेले तांदूळ; **अन्न** म्हणजे शिजवलेला भात.२२.

**आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा पशुपक्षिनिवारणैः । सस्यं ररक्ष पश्चात्तच्छित्वा धान्यं स निर्ममे ।।२३।।**
**शशंस गुरवे न्यस्तो धान्यराशिर्मया गुरो । क्षेत्रेऽत्रानेतुमेकं मे शकटं देहि सर्षभम् ।।२४।।**
**तच्छुत्वा शकटं तस्मै स लुलायेन योजितम् । प्रददौ स तमादाय नीत्वा विन्यस्य चाखिलान् ।।२५।।**
**शालीनाहरदर्धाध्वं तत्र पङ्के सकासरः । संलग्नोऽभूत्स्वयं सोऽथ स्वकण्ठेऽयोजयद्युगम् ।।२६।।**
**सलुलायः स शिष्यस्तु तत्र भारातिरेकतः । पपात तत्र सहसा धौम्यः प्राप यदृच्छया ।।२७।।**

आज्ञा प्रमाणम् इति उक्त्वा सः पशु+पक्षि+निवारणैः सस्यं ररक्ष, पश्चात् तत् छित्त्वा धान्यं निर्ममे।२३। गुरवे शशंस, '(हे) गुरो, मया क्षेत्रे धान्य+राशिः न्यस्तः। अत्र आनेतुं मे एकं सः+ऋषभंर शकटं देहि।'२४। तत् श्रुत्वा सः तस्मै लुलायेन योजितं शकटं प्रददौ। स तं आदाय नीत्वा अखिलान् शालीन् विन्यस्य आहरत्।२५। तत्र अर्ध+अध्वं सकासरः (शकटः) पङ्के संलग्नः अभूत्। अथ सः स्वयं स्वकंठे युगं अयोजयत्।२६। सः शिष्यः तु तत्र भारातिरेकतः सलुलायः पपात। तत्र धौम्यः यदृच्छया सहसा प्राप।२७।

'आपली आज्ञा प्रमाण आहे,' असे म्हणून ती मस्तकी धारण करून, बैदाने पशू, पक्षी इत्यादिकांपासून त्या धान्याची राखण करून योग्य वेळी त्या पिकातील धान्य खळे करून धान्य बाजूला केले.२३. मग त्यांनी गुरूंना जाऊन सांगितले, 'गुरुमहाराज, मी शेतांत धान्याची रास लावली आहे. ते इथे घरी आणायला मला मला एक बैल जोडलेली गाडी पाहिजे.'२४. ते ऐकून गुरूंनी त्याला एक रेडा जोडलेला गाडा दिला. बैद तो गाडा घेऊन शेताला आला आणि त्याने सगळ्या साळी त्याने त्यांत भरल्या.२५. तो गाडा घेऊन येतांना अर्ध्या वाटेत तो रेड्यासकट चिखलांत रुतला. तेव्हां शिष्याने स्वतःलाच त्या गाड्याच्या जुवाला जुपून घेतले.२६. रेड्यासह स्वतः गाडा ओढत असतां तो शिष्य ओझे फार झाल्याने पडला. एवढ्यांत धौम्य ऋषि फिरत फिरत तिथे आले.२७.

**तत्कर्म प्रेक्ष्य घोरं तं मोचयित्वा प्रसन्नधीः । वरं तस्मै ददौ येन स परत्रात्र चोत्तमः ॥२८॥**
**अथोपमन्युमाहैष गाश्चारय सदेत्यथ । कतिकालं तदा चक्रे स्वल्पभुक्क्षुधितोऽभवत् ॥२९॥**
**वने विप्रालयान्प्रेक्ष्य स्वं पुपोषान्नयाच्ञया । पुष्टोऽसि कथमित्युक्तो गुरुणा तन्न्यवेदयत् ॥३०॥**
**तन्मे देहीति गुरुणा भाषितः स तथाकरोत् । स पश्चाद्याच्ञयारक्षत्स्वं तद्वेदापि वै मुनिः ॥३१॥**
**द्विवारमर्पयेत्यूचे सच्छिष्योऽपि तथाकरोत् । पीत्वा ररक्ष गा दुग्धं वत्सपीतावशेषकम् ॥३२॥**

तत् घोरं कर्म प्रेक्ष्य, तं मोचयित्वा प्रसन्न+धीः तस्मै वरं ददौ, येन सः परत्र अत्र च उत्तमः (बभूव)।२८। अथ एष उपमन्युं आह, 'सदा गाः चारय', इति। अथ कतिकालं स्वल्प+भुक् तथा चक्रे। क्षुधितो अभवत्।२९। वने विप्र+आलयान् प्रेक्ष्य स्वं अन्न+याच्ञया पुपोष। गुरुणा कथं पुष्टः असि? इति उक्त्वा तत् न्यवेदयत्।३०। गुरुणा तत् मे देही इति भाषितः सः तथा अकरोत्। स पश्चात् याच्ञया स्वं अरक्षत्। मुनिः तत् अपि वै वेद।३१। 'द्विवारं अर्पय', इति ऊचे। सत्+शिष्यः अपि तथा अकरोत। वत्स+पीत+अवशेषकं दुग्धं पीत्वा गाः ररक्ष।३२।

आपल्या शिष्याने जिवावर उदार होऊन केलेले ते गाडा ओढण्याचे भयंकर कर्म पाहून गुरूंनी त्याला जुवांपासून मोकळे केले. त्याच्या ह्या सेवाभावाने प्रसन्न झालेल्या धौम्य मुनींनी त्याला असा वर दिला जेणेकरून तो इहलोकांत विद्यादींच्या प्राप्तीने आणि परलोकांत दिव्य भोगांनी श्रेष्ठ गती पावला.२८. मग ह्या गुरूंनी उपमन्यूला, 'तूं गाई चारत जा', असे सांगितले. सकाळी लवकरच अल्पच आहार घेऊन तो गाई चारायला जाऊं लागला. पण त्याला भुकेने व्याकुळ केले.२९. रानांत ब्राह्मणाची घरे पाहून त्यांच्याकडे माधुकरी मागून तो आपले पोट भरू लागला. गुरूंनी त्याला विचारले, '(घरी अन्न पुरेसे मिळत नसतांही) तूं कसा धष्टपुष्ट दिसतोस?' तेव्हां त्याने त्यांना सर्व सांगितले.३०. गुरूंनी, 'ते माधुकरीचे अन्नही घरी आणून देत जा', असे सांगितल्यावरून तो तसे करूं लागला. मग तो पुन्हां एकदां माधुकरी मागून आपली भूक भागवूं लागला. तेसुद्धा गुरूंना कळलेच!३१. त्यांनी दुसरी भिक्षाही घरीच द्यायला सांगितली. त्या आज्ञाधारक शिष्याने बिनतक्रार तसेच केले. मग तो वासरांनी पिऊन सांडलेले गाईंचे दूध ओंजळीत घेऊन पिऊन गाई राखूं लागला.३२.

**तज्ज्ञात्वा धीभ्रंशभिया वारितो गुरुणा वने । अर्कक्षीरं दधौ पातुं तत्तस्याक्ष्णोः पपात ह ।।३३।।**
**स पपातान्धवद् गावो ययुर्गेहं गुरुस्तदा । अन्वेष्य तं तथा दृष्ट्वा तं प्राह स्तुहि रेऽश्विनौ ।।३४।।**
**सोऽश्विस्तवाद्दृष्टिमाप गुरुणा तदुपर्यपि । कृपा कृता तेन सोऽपि कृतकृत्योऽभवद्द्रुतम् ।।३५।।**
**तच्छिष्या अपि तत्तुल्या बभूवुः शृणु सादरम् । उद्दालकोऽस्य शिष्यः सन्सत्रेऽहीनदहद्बहून् ।।३६।।**

तत् ज्ञात्वा गुरुणा धी+भ्रंश+भिया वारितः। वने अर्कक्षीरं पातुं दधौ। तत् तस्य अक्ष्णोः पपात ह।३३। सः अन्धवत् पपात। गावः गेहं ययुः। तदा गुरुः तं अन्वेक्ष्य तथा दृष्ट्वा प्राह, 'रे, अश्विनौ स्तुहि।'३४। सः अश्वि+स्तवात् दृष्टिं आप। तत् उपरि अपि गुरुणा कृपा कृता। तेन सः अपि द्रुतं कृतकृत्यः अभवत्।३५। तत्+शिष्याः अपि तत्+तुल्या बभूव। सादरं शृणु। उद्दालकः अस्य शिष्यः सन्। सत्रे बहून् अहीन् अदहत्।३६।

ते गुरूंना समजल्यावर त्यांनी उष्टे दूध प्याल्याने बुद्धीवर दुष्परिणाम होईल म्हणून त्याला मनाई केली. तेव्हां तो एकदां वनांत गाई चारायला जात असतां एका तुटलेल्या रुईच्या झाडांतून गळणारा चीक त्याने पाहिला. तेव्हां 'हे कांही उष्टे नाही' असा विचार करून पिण्यासाठी ओंजळीत घेतले. पण ते पीत असतांना चुकून त्याच्या डोळ्यांत गेले.३३. त्यामुळे त्याची दृष्टी जाऊन तो आंधळ्यासारखा तिथे एका खड्ड्यात पडला. गाई घरी गेल्या. तेव्हां उपमन्यू कां आला नाही याचा शोध घेत, त्याच्या कण्हण्याच्या आवाजाच्या अनुरोधाने गुरू तिथे आले. त्यांनी त्याची ती अवस्था पाहून त्याला अश्विनीकुमारांची स्तुती त्यांच्या मंत्राद्वारा करायला सांगितली.३४. त्याप्रमाणे उपमन्यूने अश्विनीकुमारांचे स्तवन केले आणि त्याची दृष्टी परत आली. पूर्वीच्या दोन शिष्यांप्रमाणे त्याच्यावरही गुरूंनी कृपा केली आणि तोसुद्धां कृतकृत्य झाला.३५. त्याचे - उपमन्यूचे शिष्यही त्याच्यासारखेच श्रेष्ठ झाले. उद्दालक नांवाच्या त्याच्या शिष्याने जनमेजयाने केलेल्या सर्पसत्रांत असंख्य सर्पांची आहुती दिली.३६.

**जनमेजयतोषार्थं स्वर्गाच्छक्रं समानयत् । अयं गुरुप्रसादस्तत्-तोषात्प्राप्यो न चान्यथा ।।३७।।**
**अतस्तमेव शरणं सर्वभावेन गच्छ भोः । तत्प्रसादात्परां शान्तिं मोक्षं प्राप्स्यसि दुर्लभम् ।।३८।।**

**।। विप्र उवाच ।।**

**युज्यते भिन्नधात्वैक्यं न मुक्तायास्तथा हृदः । तद्धृद्भिन्नं न यास्येऽतः प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ।।३९।।**
**इति तन्निश्चयं ज्ञात्वा के विन्यस्य करं गुरुः । तापदग्धाशुभस्यास्य प्राहाङ्ग स्वगुरुं स्मर ।।४०।।**

जनमेजय+तोषार्थं स्वर्गात् शक्रं समानयत्। अयं गुरु+प्रसादः तत्+तोषात् प्राप्यः। न च अन्यथा।३७। भोः, अतः तं एव सर्व+भावेन शरणं गच्छ। तत्+प्रसादात् परां शांतिं (तथा) दुर्लभं मोक्षं प्राप्स्यसि।३८। विप्र उवाच। भिन्न+धातु+ऐक्यं युज्यते, न मुक्तायाः। तथा हृदः। तत् हृत् (मया) भिन्नम्। अतः न यास्ये। ते अग्रतः प्राणान् त्यक्ष्यामि।३९। इति तत्+निश्चयं ज्ञात्वा ताप+दग्ध+अशुभस्य अस्य के करं विन्यस्य प्राह, अङ्ग, स्वगुरुं स्मर।४०।

जनमेजयाच्या आदेशाने त्याने तक्षकाला आश्रय दिलेल्या इंद्रालाही स्वर्गांतून खाली आणले. हा गुरूंचा कृपाप्रसाद केवळ त्यांना प्रसन्न करूनच प्राप्त होतो. त्याला दुसरा कांहीही उपाय नाही. गुरुकृपेविण आपल्या बुद्धीच्या बळावर ते ज्ञान मिळवतां येत नाही. ही मति तर्काने मिळवतां येत नाही असे कठोपनिषदाचे (१:२:९) प्रतिपादन आहे.३७. 'अरे ब्राह्मणा, याकरितां तूं सर्वभावे तुझ्या गुरूंनाच शरण जा. गीतेच्या वचनानुसार (४:३९) त्यांच्याच ज्ञानरूपी प्रसादाने तुला परम शांतीचा तसेच दुर्लभ अशा मोक्षाचाही लाभ होईल.'३८. तो ब्राह्मण म्हणाला, 'प्रभो, सोन्याचांदीसारख्या धातूचे पात्र, अलंकार इत्यादी भंग पावले तर ते वितळवून जोडतां येतात. मोती मात्र फुटले तर जोडतां येत नाही. मनाचेही तसेच आहे. मी माझ्या गुरूंचे मन मोडले आहे. तरी मी आतां त्यांच्याकडे कोणत्या तोंडाने जाऊं? त्यापेक्षां मी माझ्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून इथेच आपल्यासमोरच प्राणत्याग करतो.'३९. हा त्याचा निर्धार पाहून पश्चात्तापाने त्याची पापे नष्ट झाल्याचे जाणून श्रीगुरूंनी त्याच्या शिरावर हात ठेवला आणि म्हणाले, 'बा ब्राह्मणा, आपल्या गुरूंचे स्मरण कर.'४०.

**द्विजोऽपि स्वगुरुं स्मृत्वा तत्स्वरूपमिव प्रभुम् । ददर्श श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टाव स मुदश्रुयुक् ।।४१।।**
**तमाह प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुस्त्वं यथाक्रमम् । लघु निस्तीर्य कर्मौघं परां संसिद्धिमाप्स्यसि ।।४२।।**
**त्वया व्यालोकि रूपं मे यत्तद्भक्त्या स्मरन्क्रियाः । मदर्थ इत्सदासक्तः कुर्वन्सिद्धिमुपैष्यसि ।।४३।।**
**इति द्विजं तं निजरूपदर्शनात् सुदुर्लभस्वात्मसुखान्वितं प्रभुः ।**
**विधाय चैकं द्विजपुत्रमागतं समुद्दधारच्छितजिह्वमप्यरम् ।।४४।।**
**(क्षेपकः) ये केचन श्रीगुरुमीशबुद्ध्या सन्तापदग्धैनस आव्रजन्ति ।**
**प्रच्छिद्य ते मोहसमूहमाशु स्वानन्दसौख्यं द्विजवत्प्रयान्ति ।।१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते गुरुभक्त्यनुशासनं नाम दशमोऽध्यायः ।।१०।।**

द्विजः अपि स्वगुरुं स्मृत्वा प्रभुं तत्+स्वरूपं इव ददर्श। सः प्रेम्णा मुत्+अश्रु+युक् श्रीगुरुं तुष्टाव।४१। तं प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुः प्राह। कर्म+ओघं यथा+क्रमं लघु निस्तीर्य परां संसिद्धिं आप्स्यसि।४२ यत् मे रूपं त्वया व्यालोकि तत् भक्त्या स्मरन् इत् सदा क्रियाः मत्+अर्थ असक्तः कुर्वन् सिद्धिं उप+एष्यसि।४३। इति प्रभुः तं द्विजं निज+रूप+दर्शनात् सु+दुः+लभ+स्व+आत्म+सुख+अन्वितं विधाय च एकं छित+जिह्वं द्विजपुत्रं आगतं अरं सं+उत्+दधार।४४। ये केचन सन्ताप+दग्ध+एनस श्रीगुरुं ईश+बुद्ध्या आव्रजन्ति, ते द्विजवत् मोह+समूहं आशु प्रच्छिद्य स्वानंद+सौख्यं प्रयान्ति।१।

त्या विप्राने आपल्या गुरूंचे स्मरण करतांच त्याला श्रीगुरू भगवानांच्या ठिकाणी त्यांचेच दर्शन झाले. त्याचा भक्तिभाव उचंबळून डोळे आनंदाश्रूंनी डबडबले आणि तो हात जोडून श्रीगुरूंचे स्तवन करूं लागला.४१.त्या विनम्र ब्राह्मणाला श्रीगुरू म्हणाले, 'तुझ्या प्रारब्धानुसार एकामागून एक येणाऱ्या सुखदुःखांचे भोग सादर भोगून लवकरच संपवशील आणि अंती मोक्षरूपी परमसिद्धी पावशील.' इथे प्रारब्धभोगांची अनिवार्यता आणि श्रीगुरु-ईशकृपेने त्यांचे सुसह्यत्व दाखविले आहे.४२. नारदपुराणांत (पूर्वार्ध ३१:६९-७०) म्हटले आहे की आपण केलेले शुभ तसेच अशुभ

कर्म भोगावेच लागते. न भोगतां कर्म अब्जावधी कल्पांतही घटणार नाही. मग अगणित जन्मातील संचित कर्म आणि सतत निर्माण होत असलेले क्रियमाण कर्म पाहतां हा कर्मांच्या ओघांतून लवकर कसे पार पडतां येईल? ह्या प्रश्नाचे उत्तर ह्या श्लोकांत दिले आहे. 'हे जे माझे स्वरूप तूं पाहिले आहेस त्याचे सतत भक्तिपूर्वक चिंतन करीत सर्व नित्य-नैमित्तिक कर्मे अनासक्त वृत्तीने माझ्या प्रीत्यर्थच करीत जा. जशी देवावर तशीच गुरूंवर भक्ती (श्वेताश्वतर उ. ६:२३) ठेव. अशा ह्या निष्काम कर्मयोगाच्या आचरणाने तुझे अंतःकरण शुद्ध होऊन त्यांत ज्ञानाचा प्रकाश पडेल आणि द्वैताचे स्फुरण मावळून तुला मुक्तीचा लाभ होईल.'४३. अशा प्रकारे त्या विप्राला आपल्या स्वरूपाच्या दर्शनाने अत्यंत दुर्लभ अशा प्रत्यगात्मा (स्व) आणि परमात्मा यांच्या अखंडैकरस सामरस्याने होणाऱ्या सुखाचा लाभ करून दिला आणि कृष्णातीरावर एका जीभ कापून आलेल्या ब्राह्मणपुत्राचा उद्धार केला.४४. (ह्या श्लोकांतील विषय मूळ गुरुचरित्रात असा आलेला नसल्याने त्याला क्षेपक म्हटले असावे.) जे कुणी पश्चात्तापाच्या आगीत आपली पापे जाळून श्रीगुरूंना परमेश्वरस्वरूप मानून शरण येतात ते सर्व मोहमायेचा तत्काळ भेद करून आत्मानंदाचे अधिकारी होतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा दहावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**क आगतश्छातजिह्वः कथं भगवतोद्धृतः । तत्कथामृतमास्वाद्य तृष्णा मेऽतीव वर्धते ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**करवीरे सुधीपुत्रो जातोऽज्ञस्तं जगुर्बुधाः । विपुच्छशृङ्गो गौस्त्वं गोभाग्यं नात्तं तृणं तु यत् ।।२।।**
**विद्यानिधिर्हर्त्रलभ्यः स शिष्यार्पित एधते । श्रेष्ठेष्वर्च्यं करोत्यूनं क्वाप्यस्वं च धनान्वितम् ।।३।।**

नामधारक उवाच। कः छात+जिह्वः आगतः? भगवता कथं उद्धृतः? तत् कथा+अमृतम् आस्वाद्य मे तृष्णा अतीव वर्धते।१। करवीरे सु+धी+पुत्रः अज्ञः जातः। तं बुधाः जगुः। त्वं वि+पुच्छ+शृंगः गौः। यत् तृणं न अत्तं तत् गो+भाग्यम्।२। विद्या हर्तृ+अलभ्यः निधिः। सः शिष्य+अर्पितः एधते। ऊनं श्रेष्ठेषु अर्च्यं करोति। क्व अपि च अस्वं धन+अन्वितं (करोति)।३।

**श्रीगणेशाय नमः।** *अकराव्यांत संत्रस्त ब्राह्मणाची। छिन्न जीभ सांधुनी साची। गंगानुजावर साउली कृपेची। करुनी पादुका स्थापिल्या।।१।।* सद्गुरूंचा आश्रय केल्यानेच अखंडतया एकरस होऊनच निर्गुण आत्मतत्त्वाची ओळख पटते हाच खरा सिद्धांत असला तरी मंदबुद्धी साधकांना सगुण परमात्म्याचीच उपासना इष्ट आहे. त्यासाठी भगवंताच्या गुणांचे वर्णन करावे. आत्मसाक्षात्कारानंतर स्त्री-पुत्रादि विषयांपासून मनाची सहजच उपरती होते. पण अनेक जन्मात केलेल्या विषयसेवनाने, त्या विषयांकडे असलेला ओढा सहसा कमी होत नाही. त्या विषयांची आसक्ती दूर करण्यासाठी ईश्वररूप अशा सद्गुरूंची सेवा केली पाहिजे हे मागच्या अध्यायांत सफल गुरुसेवेच्या उदाहरणाने स्पष्ट केले. त्याच्याच दृढीकरणासाठी आतां या अध्यायांत इतर देवतादिकांच्या उपासनेपेक्षा ईश्वराचेच सगुण रूप असलेल्या सद्गुरूंच्या उपासनेने ऐहिक आणि पारलौकिक लाभही अनायासेच होतात हे विशद करण्याला आरंभ करीत आहेत.

**सुखे स्त्रीवावनेऽम्बेव सखेव क्वापि तातवत् । हिते बोधे च गुरुवद्विद्या धिक्त्वामविद्य रे ।।४।।**

**इति निर्भर्त्सितस्त्रस्तो भिल्लवाटीं ययौ स तु । प्रायोपविष्टोऽनशन आनर्च भुवनेश्वरीम् ।।५।।**

सुखे स्त्री इव। अवने अम्बा इव। क्व अपि सखा इव। हिते तातवत्। बोधे च गुरुवत्। हे अविद्य त्वां धिक्।४। इति निर्भर्त्सितः त्रस्तः सः भिल्लवाटीं ययौ। प्रायोपविष्टः अनशनः भुवनेश्वरींआनर्च।५।

नामधारक प्रश्न करीत आहे. 'मागील अध्यायाच्या शेवटी आपण जीभ कापून घेतलेल्याही ब्राह्मणाचा उद्धार केला असे म्हटले. तो जीभ नसलेला कोण? भगवंतांनी त्याचा कसा उद्धार केला? त्या श्रीगुरूंचे कथामृत जितके प्राशन करावे तितकी त्याची गोडी वाढतच जाते. अशी ही अनुपम गुरुलीला मला कथन करावी.'१. सिद्ध मुनी सांगू लागले - श्रीक्षेत्र कोल्हापूर येथे एका ब्राह्मणाला दुर्दैवाने मंदबुद्धी मुलगा झाला. अभ्यासात त्याचे लक्षच लागत नसे. तेव्हां त्याचे शेजारचे व आप्त त्याला अभ्यासाकडे प्रवृत्त करण्यासाठी त्याला म्हणाले, केवळ आहार आणि विहारानेच तुष्ट रहाणारा असा तू केवळ शेपूट आणि शिंगे नसलेला पशूच आहेस. त्यांच्याप्रमाणे तूं गवत खात नाहीस हे त्यांचे सद्भाग्यच होय. (*'साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः। तृणं न खादन्नपि जीवमानः सद्भागधेयं परमं पशूनाम्।। नीतिशतकः १२'*)२. विद्या हा असा खजिना आहे जो चोराला गंवसत नाही; शिष्याला दिला तर कमी न होतां वाढतोच; अकिंचनालाही (ऊनं) श्रेष्ठांमध्ये पूज्य करतो; निर्धनालाही धनी बनवितो. (*'हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम्। कल्पान्तेष्वऽपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनं येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते।।'* नीतिशतकः १६)३. पत्नीप्रमाणे सुख देणारी, आईसारखी सांभाळणारी, देशाविदेशांत कुठेही मित्रासारखी, पित्याप्रमाणे हित करणारी आणि गुरूसारखी बोध देणारी विद्या तूं संपादली नाहीस. तुझा धिक्कार असो.४. अशा रीतीने त्यांच्या निंदेने आणि अपमानाने त्रासून तो भिलवडीला गेला. तिथे आमरण उपोषण करीत त्याने देवी भुवनेश्वरीची उपासना आरंभिली. ५.

**दत्वाऽलब्धप्रसादोऽस्यै जिह्वां छेत्तुं कमुद्यतः । स्वप्ने देव्याह तं दण्डी कृष्णातीरेऽस्ति तं भज ।।६।।**
**इति श्रुत्वा दुःखितोऽपि धृत्यागत्य स सद्गुरुम् । ननामाश्रूत्तगात्रस्तन्मूर्ध्न्यधाच्छ्रीगुरुः करम् ।।७।।**
**स्पर्शेऽयोऽपि यथा हेम हंसः काकोऽपि मानसे । यथा विद्वांस्तथाभूत्स सुजिह्वः स्पर्शनाद्विभोः ।।८।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्कं ध्यायन्त्यङ्घ्र्यब्जमस्य ये । अपैति तत्प्रसादाद्धी-जाड्याद्यं नात्र चित्रमित् ।।९।।**

जिह्वां छेत्तुं दत्वा अलब्धप्रसादः कं (छेत्तुं) उद्यतः। स्वप्ने तं देवी आह। कृष्णा+तीरे दण्डी अस्ति, तं भज।६। इति श्रुत्वा दुःखितः अपि धृत्या अश्रु+उत्त+गात्रः सः सद्गुरुं आगत्य ननाम। तत्+मूर्ध्नि श्रीगुरुः करं अधात्।७। यथा अयः अपि स्पर्शे हेमः, यथा काकः अपि मानसे हंसः तथा सः विभोः स्पर्शनात् सुजिह्वः विद्वान् अभूत्।८। ये अस्य वज्र+अंकुश+ध्वजा+अब्ज+अंकं अंघ्रि+अब्जं ध्यायन्ति तत्+प्रसादात् धी+जाड्यादि अपैति। न अत्र चित्रं इत्।९।

त्याने देवीला आपली जीभ कापून वाहिली तरी ती प्रसन्न झाली नाही. मग तो आपले डोकेच कापायला सिद्ध झाला. इतक्यांत त्याला दैवयोगाने झोप आली. स्वप्नांत त्याला देवीचे दर्शन झाले. ती त्याला म्हणाली, कृष्णेच्या पैलतीरावर एक संन्यासी आहेत. त्यांना तूं शरण जा म्हणजे तुझे काम होईल.६. हे ऐकून तो दुखाने व्याकुळ असूनही अश्रूंनी भिजलेल्या अंगाने धीर धरून सद्गुरूंकडे गेला आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. अशा त्या जीभतुटक्या ब्राह्मणाच्या मस्तकावर श्रीगुरूंनी आपला हात ठेवला.७. परीसाला लागतांच लोखंडाचेही जसे सोने व्हावे, मानस सरोवरांत कावळाही हंस व्हावा तसा भगवंतांच्या स्पर्शाबरोबर त्या ब्राह्मणाची जिह्वा चांगली झाली आणि तो विद्वानही झाला. जीभ चांगली झाली म्हणजे तुटलेली परत पुरती झाली एवढेच नव्हे तर ती उत्तम वक्तृत्वाने आणि सुमधुर आलापांनी संपन्न झाली. आत्मज्ञानाला योग्य अशा कार्यकारणांचा प्रादुर्भाव त्याच्यात झाला. तसेच त्याला व्यावहारिक आणि पारमार्थिक ज्ञानही प्राप्त झाले.८.

**गुर्वाज्ञया गृहं गत्वा सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । भगवांस्तत उत्थाय दक्षिणाभिमुखो ययौ ।।१०।।**
**कृष्णावेणीपञ्चनदी-संगमं सुमनोहरम् । अष्टतीर्थान्वितं पुण्यं दृष्ट्वा तस्थौ परे तटे ।।११।।**
**सरस्वती शिवा भद्रा कुम्भी भोगवतीत्यमूः । कृष्णावेण्योः संगतास्तत्संगमस्तूत्तमोत्तमः ।।१२।।**

द्विजः गुरु+आज्ञया गृहं गत्वा उभयीं सिद्धिं प्राप। भगवान् ततः उत्थाय दक्षिण+अभिमुखः ययौ।१०। कृष्णा+वेणी+पंचनदी+संगमं अष्ट+तीर्थ+अन्वितं पुण्यं सुमनोहरं दृष्ट्वा परे तटे तस्थौ।११। सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती इति अमूः कृष्णावेण्योः संगताः। तत् संगमः तु उत्तम+उत्तमः।१२।

श्रीगुरूंच्या स्पर्शमात्राने त्या ब्राह्मणाची वाचा आणि बुद्धी प्रगल्भ झाल्याचे नवल करण्याचे कारण नाही. ज्या श्रीगुरूंच्या वज्र, अंकुश, पताका आणि कमळ या चिह्नांनी अंकित चरणांचे चिंतन करणाऱ्यांच्या प्रसादानेही बुद्धीचे मांद्य आदींचा निरास होतो, प्रत्यक्ष त्यांचीच कृपा झाल्यावर तो झाला तर आश्चर्य काय?९. तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने आपल्या घरी गेला. तिथे गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून अनासक्त वृत्तीने, ईश्वराच्या प्रीतीकरिता आणि लोकसंग्रहासाठी नित्यनैमित्तिक कर्मे आचरून स्त्री, पुत्र, गृह, धन इत्यादि इह लोकांत उपभोगण्याची (ऐहिक) आणि निरतिशय ब्रह्मानंदरूप आमुष्मिकी अशा दोन्ही प्रकारच्या सिद्धी पावला. भगवान् श्रीगुरूंनी तिथून निघून दक्षिण दिशेकडे प्रस्थान केले.१०. पद्मपुराणांत (उत्तरखंड १११:१३) कृष्णा साक्षात् विष्णूचे रूप आहे तर वेणी ही भगवान शंकरांचे. ह्या दोन नद्यांच्या भेदरहित हरिहरांचे स्वरूप असणाऱ्या कृष्णावेणीचा पंचनद्यांसह झालेला अत्यंत मनोहर, पुण्यप्रद आणि आठ तीर्थांनी युक्त असा संगम पाहून त्याच्या पश्चिम तीरावर औदुंबराच्या तळवटी श्रीगुरूंनी वास केला. ह्यावर श्रीस्वामिमहाराजांनी एक मार्मिक आणि हृद्य रूपक केले आहे. 'अष्टप्रकृतींच्या जुळणीने झालेल्या देहांत चिच्छक्ती आणि जीवशक्ती यांच्या संगमांत म्हणजेच अतीव चित्ताकर्षक आज्ञा चक्राच्या पल्याड ब्रह्मरंध्रांत श्रीगुरू स्थिरावले.

**स्थलं कुरुपुराख्यं तत्कुरुक्षेत्राधिपुण्यदम् । साक्षात्प्रयागोऽयमग्रे काश्याः श्रेष्ठं महास्थलम् ।।१३।।**
**तत्रोदुम्बरकल्पद्रुर्विश्वेट्तुल्योऽमरेश्वरः । योगिन्योऽपि चतुःषष्टिर्नरोऽप्यत्रामरो भवेत् ।।१४।।**
**स्वर्याति ना तपःस्नायी संगतेऽत्र सितासिते । तीर्थान्यवाक्प्रवाहेऽत्र महाघघ्नानि कोटिशः ।।१५।।**

तत् कुरुपुर+आख्यं स्थलं कुरुक्षेत्र+अधि+पुण्यदम्। अग्रे साक्षात् प्रयागः अयं काश्याः श्रेष्ठं महास्थलम्।१३। अत्र सित+असिते संगते तपः+स्नायी ना स्वः याति। अत्र अवाक् प्रवाहे महा+अघ+घ्नानि कोटिशः तीर्थानि।१४। तत्र उदुम्बर+कल्पद्रुः, विश्वेट्+तुल्यः अमरेश्वरः, योगिन्यः अपि (वसन्ति)। अत्र नरः अपि अमरः भवेत्।१५।

तट या शब्दांत जगताच्या उत्पत्ती-स्थिती-लयादि तटस्थलक्षणांचा संकेत आहे.' अथवा **पर** म्हणजे सर्वोत्कृष्ट आणि **अतटे** अर्थात् निस्सीम सच्चिदानंदस्वरूपांत विसांवले असाही अर्थ करतां येईल.११. सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती ह्या पांच नद्या कृष्णा-वेणी यांना येऊन मिळतात तो संगम गङ्गा-यमुना इत्यादि उत्कृष्ट संगमांहूनही उत्तम आहे.१२. कुरुपुर नांवाचे हे क्षेत्र पद्मपुराणाने (स्वर्गखंड २७:९२) तिन्ही लोकांत विशेष मानले आहे. त्यानुसार कुरुक्षेत्राचे माहात्म्य भूलोकांतील सर्व तीर्थांच्या माहात्म्याइतकेच आहे. अशा कुरुक्षेत्राहून हा संगम अधिक पुण्यप्रद आहे. हा साक्षात् प्रयागच आहे. त्याच्यापुढे पूर्वेकडे युगालय (जुगुळ) हे काशीहून श्रेष्ठ महान क्षेत्र आहे.१३. ह्या धवल आणि कृष्ण प्रवाहांच्या संगमांत माघ महिन्यांत स्नान करणारे पुरुष (किंवा स्त्रिया) ऋग्वेदात (१०:७५:५) सांगितल्याप्रमाणे स्वर्गात जातात. दक्षिणाभिमुखी प्रवाहांत शुक्लतीर्थापासून संगमापर्यांत कोटिशः तीर्थे आहेत. छांदोग्य उपनिषदांत (५:१०:९) सांगितलेली सुवर्णचोरी, सुरापान, गुरुतल्प, ब्रह्महत्या आणि त्यांच्यांत सहभाग, ह्या पंचमहापापांचा नाश करणारी आहेत.१४. त्या श्रीगुरूंच्या निवासस्थानी असलेला औदुंबर हा कल्पवृक्षच आहे; पैलतीरावरचा अमरेश्वर हा विश्वेश्वरासमान आहे; तिथेच चौसष्ट योगिनींचाही वास आहे. अशा या पवित्र ठिकाणी राहणारे रागद्वेषादि असलेले मानवही शमदमादि दैवी संपदेने युक्त होतात.१५.

**मुमुक्ष्वाश्वासनं कामि-हितं सत्तमरञ्जनम् । दृष्ट्वाश्रमं मूर्तिमत्स्वं परात्मोदुम्बरे व्यधात् ।।१६।।**
**सद्विद्याढ्यामरपुरं प्राङ्निरीक्ष्यैत्य तत्र सः । स्वाचारं वैदिकं दीनं प्रभुर्भिक्षां स्म याचते ।।१७।।**
**भिक्षावृत्तेस्तदा साध्वी सात्त्विकस्य कुटुम्बिनी । अन्नाभावाद्ददौ शाकमातिथेयी तु भिक्षवे ।।१८।।**
**भक्त्यार्पितमपि प्राश्य शाकं संतृप्त ईश्वरः । तत्र शाकलतां दृष्ट्वा तामुत्पाट्याश्रमं ययौ ।।१९।।**
**तदा स्त्रीर्दुःखिता प्राह योगक्षेमकरी कुतः । उन्मूलिता लता नैव भिक्षाशाठ्यं मया कृतम् ।।२०।।**

मुमुक्षु+आश्वासनं, कामि+हितं, सत्+तम+रंजनं आश्रमं दृष्ट्वा परात्मा स्वं उदुम्बरे व्यधात्।१६। सत्+विद्या+आढ्य+अमरपुरं प्राक् निरीक्ष्य तत्र सः प्रभुः वैदिकं सु+आचारं दीनं भिक्षां याचते स्म।१७। तदा भिक्षा+वृत्तेः सात्त्विकस्य साध्वी कुटुम्बिनी भिक्षवे अन्न+अभावात् आतिथेयी शाकं ददौ।१८। भक्त्या अर्पितं शाकं अपि प्राश्य संतृप्तः ईश्वरः तत्र शाकलतां दृष्ट्वा तां उत्पाट्य आश्रमं ययौ।१९। तदा स्त्रीः दुःखिता प्राह, योग+क्षेम+करी लता कुतः उन्मूलिता? मया भिक्षा+शाठ्यं नैव कृतम्!२०।

मुमुक्षूंना आश्वासन देणारा, सकाम भक्तांचे इच्छापूर्तिरूप हित करणारा, संतसज्जनांना परमानंदाने रमविणारा तो आश्रम पाहून परमात्मरूप सद्गुरूंनी आपल्या स्वरूपाची तिथे विशेषत्वाने स्थापना केली.१६. सत् म्हणजे परा विद्या अभ्यासणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती असलेले अमरापूर पूर्वतीरावर पाहून तो मानवरूप भगवंत आचारसंपन्न, वैदिक आणि नम्र अशा एका ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागायला गेला.१७. तेव्हां यायावर वृत्तीने (भिक्षा मागूनच) निर्वाह करणाऱ्या त्या सात्त्विक ब्राह्मणाच्या साध्वी पत्नीने घरांत कांहीच अन्न नसल्याने त्या यतिवेषधारी श्रीगुरूंना (घेवड्याच्या शेंगांची) भाजी अतिथीला योग्य समजून वाढली.१८. भक्तीने अर्पण केलेली ती भाजी सेवन करूनच भगवंत तृप्त झाले. तिथून जातांना त्यांनी अंगणांत पसरलेला घेवड्याचा वेल उपटून टाकला आणि ते आपल्या आश्रमांत परतले.१९. तेव्हां ती ब्राह्मणी कळवळून आपल्या पतीला म्हणाली, 'अहो पहा तरी! त्या संन्याशाने आपला चरितार्थ चालविणारा घेवड्याचा वेल कसा उपटून टाकला! घरात खरेच कांही दुसरे नसल्याने मी त्यांना भाजी वाढली. त्यांना चाळविण्याचा माझा हेतू नव्हता.'२०.

**तां भर्तोचे मौनमेहि न कोऽपि सुखदुःखदः । लोकाः स्वकर्मसूत्रोता वृथाहङ्कारसंश्रिताः ।।२१।।**
**ईशाधीनं जगत्सर्वं येनाप्तव्यं तु यत्ततः । कोऽपि नेशोऽन्यथा कर्तुमायुश्चान्नं स यच्छति ।।२२।।**
**विश्वोद्भवलयत्राण-निदानस्यास्य चैकदृक । प्राज्ञेऽज्ञे राज्ञि रङ्केऽपि मा शुचस्तारकोऽस्त्ययम् ।।२३।।**

भर्ता तां ऊचे, मौनं एहि। न कः अपि सुख+दुःख+दः। लोकाः स्व+कर्म+सूत्र+उताः वृथा+अहंकार+संश्रिताः।२१। सर्वं जगत् ईशाधीनम्। येन यत् आप्तव्यं तत् अन्यथा कर्तुं तु कः अपि न ईशः। सः आयुः अन्नं च यच्छति।२२। विश्व+उद्भव+लय+त्राणस्य अस्य प्राज्ञे, अज्ञे, राज्ञि, रंके च अपि एक+दृक्। मा शुचः। अयम् तारकः अस्ति।२३।

पतीने तिला शांत राहायला सांगितले आणि म्हणाला, 'या जगांत कुणी कुणाला सुख वा दुःख देत नसते. आपल्या कर्माच्या धाग्यांत गुंतून सुख-दुःखांचा भोग घेणारे लोक कर्मपरतंत्र असूनही व्यर्थ मीपणा मिरवतात.' (*'सुखस्य दुःखस्य न कोपि दाता, परो ददातीति कुबुद्धिरेषा। अहं करोमीति वृधाभिमानः, स्वकर्मसूत्रे ग्रथितो हि लोकः।।' अध्यात्मरामायण* २:६:६) दुसऱ्याला बोल लावूं नये, त्यांचे दोष प्रकट करूं नयेत असा त्याचा अभिप्राय. 'वृद्ध मातापिता, साध्वी पत्नी, तान्हे मूल यांच्या पोषणासाठी शंभर दुष्कृत्येही करावी लागली तरी करावीत,' असे मनूचे (मनुस्मृति परिशिष्ट) सांगणे आहे. 'ते माझ्यासाठी असूनही मी दुःख करीत नाही. तूं तर पत्नी आहेस आणि तुझ्यावर कुणाच्याही पोषणाची जबाबदारी नाही. मग तूं का शोक करतेस?' पाप करणाऱ्याला जी गती तीच त्याचे पाप बोलून दाखविणाऱ्याची होते. यासाठी पत्नीला गप राहायला त्याने सांगितले.२१. 'हे सर्व जग ईश्वराधीन आहे. ज्याला जे कांही सुख वा दुःख मिळायचे असते तेच त्याला ब्रह्मसूत्रांच्या सिद्धांतानुसार परमात्माच (३:२:३८) देतो. त्यांत कुणीही बदल करूं शकत नाही. तोच आयु आणि अन्नही देतो.२२. सकल विश्वाचा जनक, पालक आणि संहारक अशा त्या परमेश्वराची शहाणा वा निर्बुद्ध, राजा वा रंक या सर्वांवर एकसारखीच कृपादृष्टी असते. तूं शोक करूं नकोस. (शोक म्हणजे आपल्याला हव्याशा वस्तू, माणसे इत्यादींच्या वियोगाने होणारा मनाचा संताप) हा प्रभूच तारणहार आहे.'२३.

**इत्याश्वास्य वधूं विप्रो मूलमुत्खाय तत्र सः । अर्थपूर्णं घटं लेभे सद्गुरोः संप्रसादतः ।।२४।।**
**सभार्योऽथ द्विजो गत्वा शशंस गुरवे तु तत् । स प्राह दम्पती गोप्यमिदं श्रीर्नान्यथा ध्रुवा ।।२५।।**
**ऐश्वर्यपुत्रपौत्राढ्यौ संभूयात्र निरामयौ । मोक्षं गमिष्यथो नूनं गन्तव्यं सुखमालयम् ।।२६।।**

इति वधूं आश्वास्य विप्रः मूलं उत्खाय तत्र सः सद्गुरोः संप्रसादतः अर्थपूर्णं घटं लेभे।२४। अथ द्विजः सभार्यः गुरवे गत्वा तत् तु शशंस। सः प्राह, (हे) दम्पती, इदं गोप्यम्। अन्यथा श्रीः न ध्रुवा।२५। अत्र ऐश्वर्य+पुत्र+पौत्र+आढ्यौ निरामयौ संभूय नूनं मोक्षं गमिष्यथः। सुखं आलयं गन्तव्यम्।२६।

अशी आपल्या बायकोची समजून काढून त्याने तोडलेल्या वेलीचे मूळ खोदून काढले. तिथे त्या सद्गुरूंच्या मंगल प्रसादाने द्रव्याने भरलेला घडा मिळाला. इथे अशी शंका उपस्थित होते की अर्थ म्हणजे धन हे अनर्थाचे मूळ आहे असे असतां तो सद्गुरूंचा मंगल प्रसाद कसा मानावा? अर्थ हा अनर्थ आहे खरा; पण तो विषयभोगांत आसक्त असणाऱ्यांना किंवा कवडीचुंबकांना. चित्त शुद्ध असणाऱ्या भगवद्भक्तांना तेच धन यज्ञादि सत्कर्मांनी दैवी संपत्तीच्या प्राप्तीचे साधन होतो. यासाठी तो श्रीगुरूंचा संप्रसाद म्हटलेला आहे.२४. मग तो ब्राह्मण आपल्या पत्नीसह श्रीगुरूंकडे गेला. त्याने आपल्याला धन प्राप्त झाल्याचे त्यांना सागितले. त्यावर ते म्हणाले, 'तुम्ही उभयतांनी ही गोष्ट गुप्त ठेवावी. अन्यथा ही लक्ष्मी टिकणार नाही.२५. इथे भूलोकी पुत्र-पौत्रांसह ऐश्वर्य तसेच आरोग्य भोगून अंती निश्चितपणे मुक्ती पावाल.' या वेळी त्या दंपतीने श्रीगुरूंच्या चरणांशीच राहून सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावर त्यांना 'आतां सुखाने घरी जा,' असे सांगून निरोप दिला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ते पती-पत्नी आपल्या घरी गेले आणि श्रीगुरूंच्या आशीर्वचनाप्रमाणेच ऐहिक भोग भोगून अंती मोक्ष पावले.२६.

॥ नामधारक उवाच ॥

**भिक्षावृत्तिः प्रभोः कस्मात्कल्पद्रुम उदुंबरः । सति पूज्यतमेऽश्वत्थे कुतो भगवता श्रितः ॥२७॥**

॥ सिद्ध उवाच ॥

**पक्वान्नभिक्षुको भिक्षुरिति श्रुतमतं प्रभुः । भिक्षुः सन्लीलया भेजे शम्भुवृत्तिरियं पुनः ॥२८॥**

नामधारक उवाच। 'प्रभोः भिक्षावृत्तिः कस्मात्? उदुंबरः कस्मात् कल्पद्रुमः? पूज्यतमे अश्वत्थे सति भगवता (उदुंबरः) कुतः श्रितः?'२७। प्रभुः लीलया भिक्षुः सन् भिक्षुः पक्वान्नभिक्षुकः इति श्रुतमतं भेजे। पुनः इयं शम्भु+वृत्तिः।२८।

ही कथा ऐकल्यावर नामधारकाने आपल्या मनांत उठलेले तीन प्रश्न सिद्धमुनींना विचारले आहेत. 'आपल्या भक्तांना सर्व ऐश्वर्याचे दान करणारे प्रभू भिक्षावृत्तीचा अवलंब कां करतात? औदुंबर वृक्षाला कल्पवृक्षाची योग्यता कशी आली? तसेच स्वतः भगवंतांनी आपली विभूती म्हणून गौरविलेला पिंपळ (भ.गीता ११:२६) सोडून उंबराचा आश्रय कां घेतला?'२७. **प्रभूंची भिक्षावृत्ती -** भगवंतांनी लीलेने यतिवेष घेतला असल्याने आणि संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी सिद्ध अन्नाची भिक्षा मागावी (पराशर स्मृति १:४६) अशा श्रवणाने झालेल्या मताचा अंगीकार केला. **श्रुतमत** म्हणजे बृहदारण्यक उपनिषदाचे आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी पुत्रैषणा, वित्तैषणा, लोकैषणा या तिन्हींचा परित्याग करून भिक्षेची वृत्ती अवलंब करावी हे मत (३:५:१) असाही होतो. याशिवाय शं म्हणजे सुख ते जिच्यापासून होते ती शंभू वृत्ती; अर्थात् सुखपर्यवसायी वृत्ती. *'भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः। भिक्षाहारी प्रकुरुते सोमपानं दिने दिने॥'* (भिक्षान्न सेवन करणारा हा निराहारी असतो. भिक्षा हा प्रतिग्रह मुळीच नाही. भिक्षेवर निर्वाह करणारा प्रतिदिन सोमपान करतो.) अशी स्मृति आहे. श्रीदासबोधांत समर्थ रामदासस्वामी म्हणतात, *'भिक्षा मागोन जो जेविला। तो निराहारी बोलिला। प्रतिग्रहावेगळा जाला। भिक्षा मागतां॥२॥ संतासंत जे जन। तेथें कोरान्न मागोन करी भोजन। तेणें केलें अमृतप्राशन। प्रतिदिनीं॥३॥'* (१४:२).२८.

**नखा नृसिंहावतारे विषार्ता दैत्यदारणात् । शान्ता औदुम्बरैः सोऽथ प्रीत्यानेन सदाश्रितः ।।२९।।**
**यत्र क्वाप्येष कल्पद्रुर्भूयात्तापाघदैन्यहृत् । कामदोऽहं श्रियात्रासमिति तस्मै वरोऽर्पितः ।।३०।।**
**विश्वात्मा यत्र तत्रैव वेदतीर्थामरा अपि । सन्त्युदुम्बर एवात्र कल्पद्रुर्भुवि नापरः ।।३१।।**
**तस्मादुदुम्बरतले भिक्षां कुत्रापि विश्वभृत् । अकृत्वा कामरूपाभिर्योगिनीभिः स्थितोऽर्चितः ।।३२।।**
**अज्ञानावृतविप्रास्तदज्ञात्वोचुः परस्परम् । कथं जीवत्यकृत्वायं भिक्षां मृग्यं तदद्य हि ।।३३।।**

नृसिंह अवतारे नखा दैत्य+दारणात् विष+आर्ताः (अभूवन्)। औदुम्बरैः शांता (जाताः)। अथ सः अनेन प्रीत्या सदा आश्रितः।२९। यत्र क्व अपि एष कल्प+द्रुः पाप+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात्। कामदः अहं श्रिया अत्र आसम् इति वरः तस्मै अर्पितः।३०। यत्र विश्व+आत्मा तत्र एव वेद+तीर्थ+अमराः अपि सन्ति। अत्र भुवि उदुम्बर एव कल्प+द्रुः न अपरः।३१। तस्मात् विश्व+भृत् कुत्र अपि भिक्षां अकृत्वा काम+रूपाभिः योगिनीभिः अर्चितः उदुम्बर+तले स्थितः।३२। अज्ञान+आवृत+विप्राः तत् अज्ञात्वा परस्परं ऊचुः। अयं भिक्षां अकृत्वा कथं जीवति? तत् अद्य हि मृग्यम्।३३।

**औदुंबरमाहात्म्य -** आतां सिद्धमुनि दुसऱ्या - औदुम्बरसंबंधी प्रश्नाचे उत्तर देत आहेत. नरसिंह अवतारांत ह्या भगवंताची नखे हिरण्यकशिपूचे पोट फाडतांना त्यांतील दाहक विषाने भाजली. त्या वेळी लक्ष्मीमातेने आणलेल्या उंबराच्या फळांनी तो दाह शमून नखे शांत झाली. तेव्हांपासून औदुम्बर वृक्ष देवाला प्रिय झाला आणि ते सदा त्याच्याखाली राहूं लागले.२९. जेथे कुठे - वाडीत, खेड्यांत, क्षेत्रांत, हा कल्पवृक्ष असेल तिथे तो पाप, ताप, दैन्य यांचा हारक होईल. भक्तांच्या कामना पुरविणारा मीहि, लक्ष्मीसह तेथे वास करीन असा वर त्या वृक्षाला देवाने दिला. विश्वात्मा हरी जिथे राहतो त्या औदुम्बरांतच वेद, तीर्थे आणि देवांचाही वास आहेच. त्यामुळे ह्या पृथ्वीतलावर औदुम्बरच कल्पवृक्ष आहे. दुसरा कोणताही वृक्ष नाही.३१. त्यामुळे, किंवा अमरापुरांत घेवड्याच्या भाजीची भिक्षा केल्या दिवसापासून, विश्वंभर श्रीगुरू कुठेही भिक्षा न घेतां औदुंबराच्या तळवटीच इच्छेप्रमाणे रूप धारण करणाऱ्या चौसष्ट योगिनींची पूजा घेत राहिले.३२. त्या गांवच्या अज्ञानी ब्राह्मणांना हे न कळल्यामुळे ते परस्परांत बोलूं लागले, 'हा संन्यासी भिक्षेवांचून कसा जगतो याचा आजच शोध घेऊं या!'३३.

**इत्थं विचार्य तस्थुस्ते मध्याह्ने योगिमायया । त्रस्ता ग्रामं ययुः कोऽपि ज्ञातुं शक्योऽस्य चेष्टितम् ।।३४।।**
**श्रीगुरुं द्रष्टुमागत्य भाविको भक्तिभावनम् । गङ्गानुजाख्यभक्तोऽत्र दृष्टवान् चित्रमेकदा ।।३५।।**
**जलपूर्णाऽपि कृष्णाऽदान्मार्गं तेनागमत्प्रभुः । ददर्शान्वेत्य भक्तोऽपि पुरीं दिव्यामिवान्तरे ।।३६।।**
**नीराजितो योगिनीभी रत्नसिंहासनस्थितः । स्वर्चितः प्रेक्ष्य तं देवः प्राह कोऽस्यागतः कुतः।।३७।।**

इत्थं विचार्य ते विलीय तस्थुः। मध्य+अह्ने योगि+मायया त्रस्ता ग्रामं ययुः। अस्य चेष्टितं कः अपि ज्ञातुं शक्यते?३४। एकदा गङ्गानुज+आख्यः भाविकः भक्तः भक्तिभावनं श्रीगुरुं द्रष्टुं आगत्य चित्रं दृष्टवान्।३५। जलपूर्णा अपि कृष्णा मार्गं अदात्। तेन प्रभुः आगमत्। अनु एत्य भक्तः अपि अंतरे दिव्यां इव पुरीं ददर्श।३६। रत्नसिंहासनस्थः स्वर्चितः योगिनीभिः नीराजितः देवः तं प्रेक्ष्य प्राह, 'कः असि? कुतः आगतः?'३७।

असा विचार करून ते ब्राह्मण श्रीगुरूंवर लक्ष ठेवून लपून बसले. पण दुपारच्या वेळी ईश्वराच्या मायेने भ्रमित होऊन घाबरून घरी गेले. ह्या भगवंताची लीला कधी कुणाला जाणतां आली आहे काय?३४. एकदां गंगानुज नांवाचा एक भाविक भक्त, भक्तिगम्य श्रीगुरूंच्या दर्शनासाठी आला असतां त्याने एक चमत्कार पाहिला.३५. कृष्णा नदी पाण्याने दुथडी भरलेली असूनही तिने श्रीगुरूंना वाट करून दिली आणि त्या मार्गाने प्रभू आत गेले. भक्तही त्यांच्या मागे गेला असतां त्याने नदीच्या आंत एक जणु बेट आहे आणि त्यावर एक अमरावतीसारखी दिव्य नगरी पाहिली.३६. तिथे चौसष्ट योगनींनी श्रीगुरूंना रत्नजडित सिंहासनावर बसवून त्यांची पूजा आणि आरती केलेली त्याने पाहिली. इतक्यांत श्रीगुरूंनी त्याला पाहिले आणि विचारले की, 'तूं कोण आहेस? आणि इथे कशासाठी आला आहेस?' ३७.

**।। गङ्गानुज उवाच ।।**

**गङ्गानुजाभिधोऽहं त्वामत्रत्यो द्रष्टुमन्वगाम् । भवान्परात्मा सर्वेशो दैवान्मेऽद्यात्र गोचरः ।।३८।।**
**त्वन्मायामोहितात्मानस् त्वां विदुः केवलं नरम् । संसारसागरेऽपारे तेऽतो मज्जन्ति नेतरे ।।३९।।**
**इति प्रेम्णा स्तुतस्तस्मै हृद्यं दत्वेश्वरोऽब्रवीत् । मयि सत्यत्र यद्दृष्टं नाख्येयं कस्यचित्त्वया ।।४०।।**

'अहं गङ्गानुज+अभिधः अत्रत्यः त्वां द्रष्टुं अनु अगाम्। भवान् परात्मा सर्वेशः मे अद्य अत्र दैवात् गोचरः (जातः)'।३८। 'त्वत्+माया+मोहित+आत्मानः (ये) त्वां केवलं नरं विदुः ते अपारे संसार+सागरे मज्जन्ति। न इतरे।'३९। इति प्रेम्णा स्तुतः ईश्वरः तस्मै हृद्यं दत्वा अब्रवीत्। 'त्वया यत् दृष्टं मयि अत्र सति न कस्यचित् आख्येयम्।'४०।

'माझे नांव गंगानुज असून मी याच गांवचा (औरवाडचा) राहणारा आहे. आपल्या दर्शनासाठी आपल्या मागे आलो. आपण साक्षात् परमात्मा आणि परमेश्वर आहांत. माझ्या पूर्वपुण्याईच्या परिपाकाने जागलेल्या अनन्य भक्तीमुळे मला आज या ठिकाणी आपले दर्शन झाले आहे.' गंगानुजाला असे दुर्लभ दर्शन होण्याचे कारण श्रीस्वामिमहाराज श्रीमद्भगवद्गीतेच्या (८:२२) आधारे देत आहेत. 'हे अर्जुना, तो परम पुरुष केवळ अनन्य भक्तीनेच पावतो.' (*'पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।'*)३८. 'तुझ्या मायेने ज्यांच्या मनाला मोह झालेला आहे त्यामुळे जे अज्ञानवश तुला केवळ मानव समजतात ते ह्या दुस्तर संसारसागराचा पार (ब्रह्म) न पावल्याने त्यांतच गटांगळ्या खातात. इतर तुझे स्वरूप जाणणारे तुझे भक्त मात्र संसारसागर तरून जातात.'३९. अशा प्रेमभराने केलेल्या स्तुतीने प्रसन्न होऊन श्रीगुरुस्वरूप ईश्वराने त्याला त्याचा अभीष्ट वर देऊन सांगितले की, 'तूं हे जे आज इथे पाहिलेस ते मी या ठिकाणी (ह्या रूपाने) असेपर्यंत कुणालाही सांगूं नकोस.' मी इथून गेल्यावर मात्र सांगायला हरकत नाही असे अर्थातच यांत सूचित केले आहे.४०.

**इत्युक्तो गुरुणा हृष्टो भक्तः क्षेत्रं स्वमेत्य सः । लेभेऽसम्भाव्यसस्यर्धिं लोके श्रैष्ठ्यं च संविदम् ।।४१।।**
**स एत्य नित्यमानर्च गुरुं प्राहैकदा गुरो । काश्यां तु त्रिस्थलीयात्रा वरेत्याहुर्न वेद्मि ताम् ।।४२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**प्रयागः संगमः काशीयं गया करवीरपूः । दर्शयामीदमेतद्वत् त्रिस्थलं ते द्रुतं परम् ।।४३।।**
**इत्युक्त्वा धारयित्वा स्वपादुके त्रिस्थलीं त्विमाम् । प्रयागकाश्यौ गयां च दर्शयित्वागमत्क्षणात् ।।४४।।**

इति गुरुणा उक्तः हृष्टः सः भक्तः स्वं क्षेत्रं एत्य असम्भाव्य+सस्य+ऋद्धिं, लोके श्रैष्ठ्यं संविदं च लेभे।४१। सः नित्यं गुरुं एत्य आनर्च। एकदा सः प्राह, '(हे) गुरो! काश्यां त्रि+स्थली+यात्रा तु वरा इति आहुः। तां न वेद्मि।'४२। श्रीगुरुः उवाच। '(अयं) संगमः प्रयागः, इयं काशी, करवीरपूः गया। इदं दर्शयामि। एतत्+वत् (अ)परं त्रिस्थलं ते द्रुतं दर्शयामि।'४३। इति उक्त्वा स्वपादुके धारयित्वा, 'इमां त्रिस्थलीं तु', प्रयाग+काश्यौ गयां च क्षणात् दर्शयित्वा आगमत्।४४।

श्रीगुरूंशी असा संवाद केल्यावर आनंदभरित झालेला तो भक्त आपल्या शेतीवर परतला. त्याच्या शेतांत त्याला कल्पनेबाहेर पीक आले. समजांतही त्याला मानमान्यता मिळाली आणि आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक करणारी बुद्धी प्राप्त होऊन तो ब्रह्मज्ञानी झाला.४१. तो गंगानुज नांवाचा शेतकरी रोज औदुंबराला येऊन श्रीगुरूंची पूजा करीत असे. एकदां त्याने त्यांना प्रश्न केला, 'गुरुमहाराज, काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा श्रेष्ठ आहे असे म्हणतात ती मी जाणत नाही.' काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा नाही; पण त्याच्याच पुढील बोलण्यावरून तो अज्ञानानेच तसे बोलतो आहे हे स्पष्ट आहे.४२. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'हा कृष्णापंचगंगासंगमच प्रयाग आहे; त्यापुढे कृष्णेतील युगालय नावाचे क्षेत्र हीच काशी आहे; तसेच कोल्हापूर हीच गया आहे. ही त्रिस्थळी तुला दाखवितो. तशीच दुसरीही त्रिस्थळीही लगेच दाखवितो.'४३. असे बोलून आणि त्याला आपल्या पादुका धरायला लावून त्याला योगगतीने नेऊन ही (संगम-युगालय-कोल्हापूर) त्रिस्थळी तर दाखविलीच पण प्रयाग, काशी आणि गया ह्या ठिकाणीही नेऊन तीसुद्धा त्रिस्थळी यात्रा घडविली आणि क्षणांत परत संगमावर आपल्या आश्रमांत आणून सोडले.४४.

**तमाह त्रिस्थली त्वेषा दर्शितान्यापि तादृशी । साम्यं ज्ञात्वोभयोरत्र स्वाचारान्मुक्तिमेष्यसि ।।४५।।**
**इति योगीशवाक्यं स श्रुत्वा ज्ञात्वाऽस्य चेष्टितम् । तद्ध्यानात्कर्मबन्धं द्राक् छित्वा मुक्तो बभूव ह ।।४६।।**
**वृद्धोऽत्र महिमा सन्त आयास्यन्तीतरेऽप्यतः । गन्तव्यं क्वापि न स्थेयं साक्षादत्रेत्यमंस्त सः ।।४७।।**

तं आह, 'एषा तु त्रिस्थली दर्शिता, अन्या अपि तादृशी (दर्शिता)। उभयोः साम्यं ज्ञात्वा अत्र स्व+आचारान् मुक्तिं एष्यसि।'४५। इति योगी+ईश+वाक्यं श्रुत्वा, अस्य चेष्टितं ज्ञात्वा, तद्+ध्यानात् कर्म+बन्धं द्राक् छित्वा मुक्तः बभूव ह ।४६। अत्र महिमा वृद्धः। सन्तः, इतरे अपि आयास्यन्ति। अतः अत्र साक्षात् न स्थेयं (अन्यत्र) क्व अपि गन्तव्यं इति सः अमंस्त।४७।

मग श्रीगुरु त्या गंगानुजाला म्हणाले, 'तुला ही त्रिस्थळी आणि तशीच दुसरीही त्रिस्थळी दाखविली. या दोन्हींचे साम्य जाणून तूं आपला विहित आचार करून मुक्ती पावशील.' स्वाचार शब्दाने इथे शास्त्रानुसार विहित आचाराचे निष्काम अनुष्ठान अभिप्रेत आहे.४५. असे त्या योगिराज श्रीगुरूंचे वचन ऐकून, त्यांच्या अलौकिक लीलांचे चिंतन आणि श्रीगुरूंचे ध्यान ह्यांच्या प्रभावाने आपल्या कर्मबंधनाचा शीघ्रच छेद करून तो गंगानुज मुक्त झाला.४६. 'इथे महिमा खूपच वाढला आहे. आतां साधुजनांबरोबरच इतरही मतलबी लोकांची गर्दी वाढेल. तरी आपण आतां इथे ह्या प्रत्यक्ष रूपाने न राहतां अन्यत्र कुठे तरी जावे,' असा त्यांनी (श्रीगुरूंनी) विचार केला. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२३) तर 'या ब्रह्मनिष्ठाचा महिमा नित्य आहे तो कर्मामुळे न वाढतो न घटतो,' असे म्हटले आहे. मग इथे महिमा वाढला हे म्हणणे त्याशी विसंगत नाही कां? ह्या आक्षेपाचे उत्तर श्रीस्वामिमहाराजांनी असे दिले आहे की, सच्चिदानंदस्वरूप निर्गुण ब्रह्माच्या महिमानाची कर्मामुळे वृद्धी वा क्षय होत नाही हे खरेच आहे. सगुण ब्रह्माच्या विषयी मात्र लोकांना जसजसे अनुभव येतात त्यानुसार तसतसे त्यांच्या लेखी माहात्म्य वाढते. वस्तुतः श्रुतीचेच प्रतिपादन सयुक्तिक आहे.४७.

**नो हित्वाद्य क्व यासीति विलपन्तीः स योगिनीः । आश्वास्योचेऽत्र तिष्ठामि लोकदृष्ट्या गमिष्य इत् ।।४८।।**
**अमरेशोऽन्नपूर्णात्र विघ्नेशो युष्मदादयः । भक्तेष्टदा मयाऽप्यत्र स्थेयं वस्तुष्टये सदा ।।४९।।**
**इतः प्रभृत्यदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति । बहुलोकनिवासोऽत्र यास्यन्त्यत्र जनाः सुखम् ।।५०।।**

नः हित्वा क्व यासि? इति विलपन्तीः योगिनीः सः आश्वास्य ऊचे, लोकदृष्ट्या गमिष्ये, अत्र तिष्ठामि।४८। इतः प्रभृति अदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति। बहुलोकनिवासः। जनाः सुखं यास्यन्ति। ४९। अत्र अमरेशः, अन्नपूर्णा, विघ्नेशः, युष्मदादयः भक्त+इष्टदाः। वः तुष्टये मया अपि अत्र सदा स्थेयम्।५०।

श्रीगुरूंच्या ह्या संकल्पाने दुःखित झालेल्या योगिनींनी कळवळून त्यांना विनविले, 'आम्हांला सोडून कुठे जातां?' त्यावर त्यांची समजूत घालीत श्रीगुरू म्हणाले, 'योगिनींनो, मी मानवरूपाने अवतार घेतला आहे त्यानुसार लोकांच्या दृष्टीने मी जात असलो तरी खरोखर मी इथेच तुमच्याजवळ राहणार आहे. मी सर्वव्यापी असल्याने माझे कुठे जाणे वा येणे संभवतच नाही.'४८. इथून पुढे हे क्षेत्र सुप्रसिद्ध होईल. इथे खूप लोक राहतील. दुःखी असलेले लोकही इथे येऊन त्या स्थानाच्या प्रभावाने सुख पावतील. **सुखं** या शब्दाचा अर्थ इथे परमानंद किंवा ब्रह्मानंद असा केला आहे. ह्याला छांदोग्य उपनिषदाचा (४:१०:५) आधार घेतला आहे. *'यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव खं'* जे आकाश ते सुख म्हणजे आकाशविशिष्ट सुख. यांत अन्य इंद्रियजन्य सुखाचा अंतर्भाव होत नाही. जसे नीलकमल असे म्हटल्यावर निळ्या नसणाऱ्या, लाल-पिवळ्या कमळांचा अंतर्भाव होत नाही. *'यदेव खं तदेव खं'* या पदांत सुखाला आकाशाचे विशेषण करून सुखविशिष्ट आकाश हे भौतिक अचेतन आकाशापेक्षां भिन्न दाखविले आहे. यांवरून हार्दाकाशाचा किंवा अंतराकाशाचा बोध होतो. अंतराकाशांत अनुभवाला येणारे अतींद्रिय सुख म्हणजेच ब्रह्मानंद असा निष्कर्ष निघतो.४९. इथे अमरेश्वर, अन्नपूर्णा, विघ्नराज आणि योगिनीप्रमुख तुम्ही सर्व देवता भक्तांच्या इष्ट कामना पुरवीत असाल. तुमच्या संतोषासाठी मलाही सदैव इथे राहावेच लागेल.५०.

**सन्निपाताक्षिरुङ्मेह-कुष्ठश्लेष्मक्षयज्वरान् । वातपैत्तिकगुल्माद्यान् देशाद्युत्थान्हरेदिदम् ।।५१।।**
**पुत्रं वन्ध्याऽभयं त्रस्तो निःस्वः स्वं रोग्यनामयम् । मुमुक्षुः सद्गतिं यद्यद्यस्येष्टं स लभेत्सदा ।।५२।।**
**सहस्रगोदानफलं पर्वक्रान्तिग्रहाप्लुतौ । नुः कोटिफलमत्राल्प-जपहोमसुरार्चनैः ।।५३।।**
**प्रदक्षिणाऽश्वमेधादि-फलदा नुः पदे पदे । दुर्गताः पितरोऽप्यत्र श्राद्धाद्यान्ति परां गतिम् ।।५४।।**
**इत्याश्वास्य स योगिनीः परतरः कल्पद्रुमूलेऽमले । संस्थाप्य स्वसुपादुके नर इह स्नात्वार्चयेदष्टसु ।।**
**तीर्थेष्वीश्वरयोगिनीसुरयुते मत्पादुके द्राग्लभेत् । सोऽभीष्टं त्विति ताः प्रभाष्य स ययौ भीमातटं योगिराट् ।।५५।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे कृष्णापञ्चनदीसङ्गमोत्कर्षकथनं नामैकादशोऽध्यायः ।।११।।**

सन्निपात+अक्षिरुक्+मेह+कुष्ठ+श्लेष्म+क्षय+ज्वरान् वात+पैत्तिक+गुल्म+आद्यान् देशादि उत्थान् इदं हरेत्।५१। वन्ध्या पुत्रं, त्रस्तो अभयं, निःस्वः स्वं रोगी अनामयं, मुमुक्षुः सद्गतिं, यत् यत् यस्य इष्टं सः सदा लभेत्।५२। पर्व+क्रान्ति+ग्रह+आप्लुतौ सहस्र+गो+दान+फलम्। अत्र अल्प+जप+होम+सुर+अर्चनैः नुः कोटिफलम्।५३। प्रदक्षिणा नुः पदे पदे अश्वमेधादि फलदा। दुर्गताः पितरा अपि अत्र श्राद्धात् परां गतिं यान्ति।५४। इति योगिनीः आश्वास्य सः परतरः अमले कल्पद्रु+मूले स्व+सुपादुके संस्थाप्य, '(यो) नरः इह अष्टसु तीर्थेषु स्नात्वा ईश्वर+योगिनी+सुर+युते मत्पादुके अर्चयेत् सः द्राक् अभीष्टं लभेत्।' इति ताः प्रभाष्य सः योगिराट् भीमा+तटं ययौ।५५।

सन्निपात, नेत्ररोग, मूत्रविकार, कुष्ठ, कफ, क्षय, ज्वर, वात, पित्त, गुल्म इत्यादि विकार तसेच महामारीसारखे सांसर्गिक रोगही ह्या क्षेत्राच्या प्रभावाने कसल्याही चिकित्सेविना दूर होतील.५१. वांझेला मूल, पीडिताला अभय, निर्धनाला धन, रोग्याला आरोग्य, मुमुक्षूंना सद्गती, ज्याला ज्याला ज्याची इच्छा असेल ते त्याला नेहमीच लाभेल.५२. दर्शादि पर्वकाळी, मेषादि रविसंक्रमणांत, सूर्य-चंद्रग्रहणांत इथे स्नान केल्याने हजार गाई दान केल्याचे फळ लाभेल. थोड्याही प्रमाणांत केलेल्या जप, होम आणि देवपूजा यांचे कोटीपट फळ मनुष्याला लाभेल.५३. येथे प्रदक्षिणा

केल्याने पुरुषाला पावलोपावली अश्वमेधादि यज्ञाचे फळ मिळेल. एखाद्याचे पितर जरी नरकात असतील तरी इथे श्राद्ध केल्याने त्यांना उत्तम गती मिळेल.५४. असे त्या योगिनींना आश्वासन देऊन त्या परमात्म्याने औदुंबराच्या तळवटी आपल्या मनोहर पादुकांची स्थापना केली आणि म्हणाला, 'जो कोणी पुरुष (स्त्री) ह्या क्षेत्रांत अष्टतीर्थांत स्नान करून अमरेश्वर, चौसष्ट योगिनी आणि इतर देवतांची पूजा करील त्याच्या मनोकामनांची शीघ्र पूर्ती होईल.' मग ते योगिराज भीमातीरावर गाणगापूर येथे गेले.५५.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा अकरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# द्वादशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**गतेऽपि भगवत्यङ्ग कृष्णावेणीतटाश्रमात् । तस्मात्तत्रैव भजतां कार्यसिद्धिः कुतो वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गतिस्थित्यासनस्वप्ना न कदापि चिदात्मनि । लीलेयं मानुषी तस्य नरानुकृतिकारणः ।।२।।**

नामधारक उवाच। 'हे अङ्ग! भगवति कृष्णावेणी+तट+आश्रमांत् गते अपि तत्र एव भजतां कस्मात् कुतो कार्यसिद्धिः? वद।१। गति+स्थिति+आसन+स्वप्नाः चित्+आत्मनि कदा+अपि न। इयं तस्य नर+अनुकृति+कारणः मानुषी लीला।२।

*श्रीगणेशाय नमः। भूतबाधा निरसुनी ब्राह्मणीते पुत्र दिला। द्वादशाध्यायी श्रीगुरूंनी मृतपुत्रहि जीवविला।।१।।* अशा रीतीने गुरुकृपा झालेल्या विषयासक्त शिष्यांनाही श्रीगुरूंच्या कृपाप्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक सिद्धी प्राप्त होतात हे मागच्या अध्यायांत सांगितले. आतां या अध्यायांत भजनाची आवड उपजविण्यासाठी त्याच सगुणरूपधारी श्रीगुरूंच्या भक्तवात्सल्याचे निरूपण करीत आहेत. नामधारक सिद्धमुनींना विचारतात. अहो सिद्धमुनी, भगवान तर कृष्णावेणीच्या तटावरील आश्रमांतून गाणगापूरला निघून गेले. तरीही तिथेच यज्ञ-दान-तप इत्यादि उपासना करणाऱ्या भक्तांना कोणत्या दैवताकडून आणि केव्हांपासून फळ मिळाले? श्रीगुरू तर तिथे नव्हते. मग त्यांच्या भक्तांची कार्ये कशी सफळ झाली?१. नामधारकाच्या या प्रश्नाचे उत्तर उदाहरणासहित देत आहेत. उदाहरण म्हणजे सार्वत्रिक नियम सिद्ध करण्यासाठी एका अंशाचे परीक्षण. जशी शितावरून भाताची परीक्षा. **गती** म्हणजे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे; **स्थिती** म्हणजे एकाच स्थळी राहणे; **आसन** म्हणजे बसून राहणे; आणि **स्वप्न** म्हणजे निजणे. हे सगळे आत्म्याचे धर्म नाहीत. चैतन्यस्वरूप श्रीगुरूंच्या ठिकाणी संभवत नाहीत.

**भाव्यतेऽजो भावनया यद्वत्तद्वद्विभात्यसौ । एवं यद्भावनात्रेदृक् तादृग्जागर्ति तत्र सः ।।३।।**
**योगिनीवरदानादि यैर्यैर्गङ्गानुजाच्छ्रुतम् । ते ते भक्त्याभजंस्तत्र तं स तत्कामदोऽभवत् ।।४।।**

यैः यैः गङ्गानुजात् योगिनी+वर+दानादि श्रुतं ते ते भक्त्या तत्र अभजन्। तं सः कामदः अभवत्।३। अजः भावनया यद्+वत् भाव्यते तद्+वत् असौ भाति। एवं अत्र ईदृक् यत् भावना तत्र तादृक् जागर्ति।४।

'हे निर्गुण परमात्म्याच्या विषयी ठीक आहे. स्वेच्छेने कां होईना सगुण रूप धारण केलेल्या श्रीगुरूंना हे सर्व धर्म असणारच की.' या शंकेचे समाधान असे केले आहे की सत्य-ज्ञान-अनंत-आनंद यांच्या एकरसाने आपल्या नित्य षड्गुण ऐश्वर्यासहित अवतरलेल्या श्रीगुरूंचा देहादि उपाधीशी संपर्कच होऊं शकत नाही. तेव्हां हे सर्व शरीरधर्म त्यांना स्पर्शूं शकत नाही. मग 'ते भामीतीरी गेले,' असे तुम्हीच म्हणाला, त्याची काय वाट? तर स्वेच्छेने मनुष्यरूप घेतलेल्या सद्गुरूंची ही जाणे-येणे इत्यादि मानवी लीला - नाटक, आहे. निर्गुण ब्रह्म स्वतः एकमेवाद्वितीय असून, चलनादिरहित आहे; तरी एका ठिकाणीच राहूनही इतर धांवणाऱ्या इंद्रियादिकांच्या पलीकडे जातेच ना? *'अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत्। तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति'* (ईशावास्य उ. ४) ब्रह्मानंदकृत ईशावास्यभाष्यरहस्यांत ब्रह्म-विष्णू-शिव या रूपांतील परब्रह्म मायेमुळे साकारते त्याला *'तदेजति'* म्हटले आहे. वस्तुतः परब्रह्म निराकार आणि निश्चलच आहे. चलनाचा आभास उपाधीमुळे आहे. *'तन्नैजति'* या पदाने प्रकृतीच्या पलीकडील निर्गुण ब्रह्माचा बोध होतो.'२. परमेश्वराविषयी ज्याचा जसा भाव तसाच त्याला तो भासतो. त्यानुसार जिथे असा 'फलदाता भगवंत साक्षात् नांदत आहे,' अशी भावना उत्पन्न होते तिथे त्या भावाला अनुसरूनच तो जागतो - इष्टफळ देण्याला सदैव उन्मुख असतो. अशा रीतीने परमार्थांत काय किंवा व्यवहारांत काय ज्याचे जसे जसे ज्ञान असेल त्याला तसेच फळ मिळते. तैत्तिरीय उपनिषदाच्या वचनानुसार (२:६:१) ब्रह्म नाही असे जो म्हणतो तो असतच होतो. ब्रह्माचे अस्तित्वाला मानणारा संत जाणला जातो.'

**शृण्वेवं सति तत्रत्या मृतापत्यत्वदुःखिता । काचिद् द्विजसती विप्रान्स्वस्त्यर्थं शरणं ययौ ।।५।।**
**प्रपन्नां प्रेक्ष्य तां दीनां निजभक्तिविधित्सया । देवप्रेरितधीः कश्चित्तद्दैवं भूसुरोऽब्रवीत् ।।६।।**
**मृतापत्यत्वदोषांस्तु शृणु साध्वि पुरार्जितान् । मृतापत्यत्वादिदोषाः प्रायशः प्रेतहेतवः ।।७।।**

शृणु।' एवं सति तत्रत्या मृत+अपत्यत्व+दुःखिता काचित् द्विजसती स्वस्त्यर्थं विप्रान् शरणं ययौ।५। तां दीनां प्रपन्नां प्रेक्ष्य निज+भक्ति+विधत्सया कश्चित् भूसुरः तत्+दैवं अब्रवीत्।६। (हे) साध्वी, शृणु। मृत+अपत्य+दोषान् तु पुरा अर्जितान्। प्रायशः मृत+अपत्य+दोषाः प्रेत+हेतवः।७।

यावर श्रीमच्छंकराचार्यांचे भाष्य असे आहे, जो ब्रह्माचे (परमात्म्याचे) अस्तित्व मानीत नाही त्याची सर्व सन्मार्गावर, वर्णाश्रमधर्मावर श्रद्धा राहत नाही. साहजिकच तो ईश्वराला विमुख होऊन नास्तिक होतो आणि लोकांत असाधू गणला जातो. त्याच्या उलट जो ब्रह्म आहे असे म्हणतो तो ब्रह्माकडे - ईश्वराकडे नेणाऱ्या वर्णाश्रमधर्मादि सन्मार्गांवर श्रद्धा ठेवून तसे आचरण करतो. साहजिकच साधुजन त्याला सन्मार्गावर चालणारा - संत असे ओळखतात.३. ज्यानी ज्यांनी गंगानुजाकडून योगिनींना श्रीगुरूंनी दिलेले वरदान इत्यादि वृत्त ऐकले त्यांनी त्यांनी त्या पादुकांची भक्तीपूर्वक उपासना केली. त्या सर्वांच्या कामना भगवंतांनी पूर्ण केल्या.४. सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, ऐक! असा क्रम तिथे चालूं असतां तेथील (नजीकच्या शिरोळ गांवातील) एक जन्मतः होणाऱ्या अर्भकांच्या मृत्यूमुळे त्रस्त असलेली एक ब्राह्मणस्त्री ब्राह्मणांना शरण गेली आणि तिने आपली मुले वाचविण्याचा उपाय विचारला.५.

**ब्रह्महा भ्रूणहा वाऽपि गोघ्नोऽश्वघ्नोऽपरार्थहृत् । ब्रह्मस्वात्स्वर्णहा पापी लभेज्जन्मान्तरे त्विदम् ।।८।।**
**लोहाश्मदारुचूर्णानि प्रयत्नाज्जरयेत्पुमान् । ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति ।।९।।**
**हृतस्वार्थाभिलाषेण चेन्मृतो ब्राह्मणः स तु । गत्वा पिशाचतां स्वार्थी सदा स्याद्धर्तृवंशहा ।।१०।।**

ब्रह्महा, भ्रूणहा वा, गोघ्नः, अश्वघ्नः अपि, अपर+अर्थ+हृत्, ब्रह्म+स्व+अत्, स्वर्ण+हा पापी तु जन्म+अंतरे इदं लभेत्।८। हृत+स्व+अर्थ+अभिलाषेण ब्राह्मणः मृतः चेत् स तु स्वार्थी पिशाचतां गत्वा सदा हर्तृ+वंश+हा स्यात्।९। लोह+अश्म+दारु+चूर्णानि पुमान् प्रयत्नात् जरयेत्। ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति?१०।

त्या काकुळतीने विनवणी करणाऱ्या ब्राह्मणीला पाहून, तिला आपल्या भक्तीकडे आकृष्ट करण्यासाठी श्रीगुरूंनीच ज्याच्या बुद्धीला प्रेरणा केली होती अशा कुणा एका ब्राह्मणाने तिला तिच्या प्राक्तनाची कल्पना दिली. ज्योतिष्यादि शास्त्राच्या आधारे नव्हे तर श्रीगुरुप्रेरित बुद्धीने!६. प्रथमतः त्याने सामान्यतः जन्मतांच मुले मरण्याला कारण असलेल्या पापांविषयी सांगितले. 'हे दोष पूर्वजन्मार्जित असतात,' असे सांगून तो म्हणाला, 'हे दोष बहुतेक पिशाचबाधेमुळे घडतात.७. ब्राह्मणाची हत्या करणारा, स्त्रियांचे गर्भ किंवा अर्भक यांची हत्या करणारा, परद्रव्याचा अपहार करणारा, ब्राह्मणाच्या द्रव्याचा बळजबरीने अथवा चोरीने उपभोग घेणारा, सोन्याची चोरी करणारा किंवा अशीच इतर पापे करणाऱ्याला पुढच्या जन्मात हे मृत अर्भकाचे दुःख भोगावे लागते.' तु शब्दाने तशीच उत्कट पापे असतील तर हितोपदेशांत (मित्रलाभ कथा ३) सांगितल्याप्रमाणे या जन्मांतही असे दुःख प्राप्त होऊं शकते. (*'अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते।'*)८. सर्व पापांत ब्राह्मणाच्या द्रव्याचा अपहार मोठा असल्याचे सांगतात. लोखंड, दगड वा लाकूड यांचा चुराही कुणी प्रयत्नाने पचवूं शकतील. पण ब्राह्मणाकडून लुबाडलेले द्रव्य त्रैलोक्यांत कोण कसे पचवील? अर्थात् कुणीही पचवूं शकत नाही.९. आपल्या अपहार झालेल्या द्रव्याच्या लोभाने जर तो ब्राह्मण मृत झाला तर तो स्वार्थाभिलाषी पिशाच योनीत जातो आणि आपले द्रव्य लुबाडणाऱ्याच्या वंशच्छेद करतो.१०.

**त्वया भवान्तरे साध्वि हृतं शौनकगोत्रिणः । द्रव्यं विप्रस्य सोऽर्भांस्ते भूत्वा प्रेतो निहन्त्युत ।।११।।**
**भोगादेव क्षयः साध्वि नान्यथारब्धकर्मणः । तस्मात्प्रारब्धजफलं भुङ्क्ष्व कोऽत्र निवारकः ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा कर्णशूलाभं त्रस्तचित्ताऽब्रवीद् द्विजम् । भो ब्रह्मन्मानुगृह्णीष्व मुक्त्युपायमुपादिश ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्रेतौर्ध्वदेहिकं कर्म प्रायश्चित्तपुरःसरम् । कारयित्वाङ्ग भर्त्रा त्वं मासमात्रं व्रतं चर ।।१४।।**

(हे) साध्वि, त्वया भव+अंतरे शौनक+गोत्रिणः विप्रस्य द्रव्यं हृतम्। सः प्रेतः भूत्वा ते अर्भान् निहन्ति उत।११। (हे) साध्वि, आरब्ध+कर्मणा भोगात् एव क्षयः। न अन्यथा। तस्मात् प्रारब्धजं फलं भुङ्क्ष्व। अत्र कः निवारकः?१२। तत् कर्ण+शूलाभं श्रुत्वा त्रस्त+चित्ता द्विजं अब्रवीत्। भो ब्रह्मन्, मां अनुगृह्णीष्व, मुक्ति+उपायं उपादिश।१३। विप्र उवाच। प्रेत+और्ध्वदेहिकं प्रायश्चित्त+पुरःसरं कर्म भर्त्रा कारयित्वा त्वं मासमात्रं व्रतं चर।१४।

इथपर्यंत सामान्य शास्त्रार्थ सांगून आतां तो ब्राह्मण त्या स्त्रीचे विशिष्ट कर्म सांगत आहे. 'हे सती, तूं पूर्वजन्मी एका शौनकगोत्रीय ब्राह्मणाचे पैसे लुबाडले. तोच आतां पिशाच होऊन तुझी बाळे मारीत आहे.११. हे सती, आपण जन्माला येतांना बरोबर आणलेले कर्म - म्हणजे प्रारब्ध. ते भोगूनच संपवतां येते. दुसरा कांहीही उपाय नाही. तेव्हां तुझ्या प्रारब्धकर्माचे फळ भोग. त्याचा कोण प्रतिकार करूं शकेल? अर्थात् कुणीही नाही.'१२. ते कर्णकटु बोल ऐकून त्या ब्राह्मणीचे मन संत्रस्त झाले. ती त्या ब्राह्मणाला म्हणाली, 'अहो विप्रवर! ह्या दुःखांतून सुटण्याचा कांही उपाय आपण मला सांगावा.'१३. त्या ब्राह्मणाने तिला सांगितले, 'त्या पिशाच झालेल्या ब्राह्मणाचे शास्त्रोक्त पिंडदानादि अंत्यकर्म, नारायणबळी इत्यादी अनुष्ठानांसहित तुझ्या पतीकडून करवून घे आणि मी पुढे सांगणार असलेले व्रत एक महिनाभर कर.' पतीच्या द्वारा अंत्येष्ट्यादि कर्मे करवून घ्यायला सांगण्याचे कारण स्त्रियांना ते स्वतंत्रपणे करायला शास्त्राज्ञा नाही. 'पतिद्वारा करवून घे' ह्या सांगण्यांत स्त्रीच मुख्य कर्ता आहे असा अर्थ काढूं नये. पतीला सांगून ते करावे असा अर्थ विवक्षित आहे.१४.

**कृष्णापञ्चनदीयोगे स्नात्वा श्रीगुरुपादुकाम् । उदुम्बरं चाष्टतीर्थस्नानपूर्वं समर्चय ।।१५।।**
**ब्राह्मणान्भोजयित्वाथ शतद्रव्यं द्विजातये । देहि शौनकगोत्राय शुद्धिस्तेनैव ते सति ।।१६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**शतद्रव्यं कुतो लभ्यं मासमात्रं करोम्यहम् । सद्गुरोरर्चनं भक्त्या स मां पायाद्भयाद्धरिः ।।१७।।**
**इति निश्चित्य सा पत्या यथानिर्दिष्टमाचरत् । दिनत्रयान्तरे स्वप्ने तस्या विप्रपिशाचकः ।।१८।।**

कृष्णा+पंचनदी+योगे स्नात्वा, अष्ट+तीर्थ+स्नानपूर्वं श्रीगुरु+पादुकां उदुम्बरं च समर्चय।१५। अथ ब्राह्मणान् भोजयित्वा शौनक+द्विजातये शतद्रव्यं देहि। (हे) सति, तेन एव ते शुद्धिः (भविष्यति)।१६। ब्राह्मणी उवाच। शतद्रव्यं कुतो लभ्यम्? अहं मासमात्रं भक्त्या सद्गुरोः अर्चनं करोमि। सः हरिः मां भयात् पायात्।१७। इति निश्चित्य सा पत्या यथा+निर्दिष्टं आचरत्। दिन+त्रय+अंतरे तस्या स्वप्ने विप्र+पिशाचकः।१८।

प्रथम कृष्णा आणि पंचगंगा यांच्या संगमांत न्हाऊन मग अष्टतीर्थांत स्नाने करावीत आणि श्रीगुरूंच्या पादुकांची तसेच औदुंबर वृक्षाची विधिपूर्वक पूजा करावी.१५. 'एक महिनाभर असे व्रत आचरून यथाशक्ती ब्राह्मणांना भोजन घालून त्या प्रेतासाठी म्हणून शौनक गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला शंभर रौप्य मुद्रांचे दान कर. हे साध्वी, ह्यानेच तुझ्या पापाची निष्कृति होईल.'१६. ती ब्राह्मणी म्हणाली, 'शंभर रौप्यमुद्रा मी कुठून आणूं? मात्र एक महिनाभर मनोभावे मी सदगुरूंची पूजा करीन. तो हरीच माझे या पिशाचाच्या भयापासून रक्षण करो.'१७. असा मनाचा निश्चय करून त्या ब्राह्मणीने आपल्या पतीसह ब्राह्मणाने सांगितल्याप्रमाणे सर्व अनुष्ठान सुरूं केले. तीन दिवसांनी तिच्या स्वप्नांत येऊन एक ब्रह्मसमंध तिला भीती दाखवून(१८) आपले पूर्वजन्मींचे लुबाडलेले धन मागूं लागला. त्या भयभीत सतीली औदुंबराच्या मुळापाशी दुःख हरण करणाऱ्या श्रीगुरूंचे दर्शन झाले.१९.

**ब्राह्मणीं भीषयित्वा तां ययाचे द्रव्यमात्मनः । भीतोदुम्बरमूले सा ददर्श श्रीगुरुं हरिम् ।।१९।।**
**तां च तं तादृशं दृष्ट्वा पिशाचं प्राह सद्गुरुः । कस्त्वं पिशाचरूपेण सतीं खेदयसेऽधम ।।२०।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**यतीन्द्र त्वय्यनर्होऽयं पक्षपातोऽहमात्मनः । अनयाऽपहृतं द्रव्यं याचितुं हीदृशोऽभवम् ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**अनेन ते कथं मोक्षो बह्वमङ्गलयोनितः । येनाप्यते सद्गतिस्तच्छृणु तेन हितं भवेत् ।।२२।।**

ब्राह्मणीं भीषयित्वा तां आत्मनः द्रव्यं ययाचे। भीता सा उदुम्बर+मूले श्रीगुरुं हरिं ददर्श।१९। तां तादृशं, तं च दृष्ट्वा सद्गुरुः पिशाचं प्राह। (रे) अधम! सतीं पिशाचरूपेण खेदयसि, त्वं कः?२०। पिशाच उवाच। (हे) यतीन्द्र! अयं पक्षपातः त्वयि अनर्हः। अनया अपहृतं आत्मनः द्रव्यं याचितुं अहं ईदृशं अभवम् हि।२१। श्रीगुरुः उवाच। अनेन ते बहु+अमंगल+योनितः कथं मोक्षो? येन सद्गतिः आप्यते तत् शृणु। तेन हितं भवेत्।२२।

त्या भयाकूल ब्राह्मणीला आणि तिला भिवविणाऱ्या त्या पिशाचाला पाहून त्याला सद्गुरूंनी विचारले, ‘अरे नीचा! त्या बिचाऱ्या सतीला कष्ट देणारा तूं कोण आहेस?’२०. तो समंध उत्तरला, ‘अहो यतिराज, आपल्यासारख्या संन्याशाला हा पक्षपात शोभत नाही. ह्या स्त्रीने लुबाडलेले माझे धन मागतां मागतां मला ही अशी अमंगळ अवस्था प्राप्त झाली.’ धनाच्या वासनेने आपल्याला या योनीत खेचून आणले असल्याने आपला कांही दोष नाही असा त्या पिशाचाचा दावा आहे.२१. श्रीगुरू त्याला म्हणाले, ‘अशा भयंकर अपत्यहत्येने तिचा छळ करून तुझी ह्या अत्यंत अमंगळ कष्टप्रद योनीतून कशी सुटका होईल? तुला सद्गती लाभेल असा उपाय ऐक. त्याने तुझे कल्याण होईल. ह्या दुःखद योनीतून तुझी मुक्ती होईल.२२.

**योन्यन्तरे हृतार्थोऽस्ति किंत्वत्र फलभागिनी । प्राप्ता दरिद्रवंशेऽसौ लभ्यतेऽतः कुतो धनम् ।।२३।।**
**अतस्तया कारयित्वा शक्त्या कर्मौर्ध्वदेहिकम् । त्वद्गोत्राय यथालभ्यं दापयित्वा धनं खलु ।।२४।।**
**विप्राय प्रेत कस्मैचित्ततो मोक्षं ददामि ते । नेदं त्वां रोचते चेत्तां रक्षामि स्वेच्छयाचर ।।२५।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**देवदेव कृतार्थोऽस्मि त्वत्पादाब्जविलोचनात् । ममाद्य निष्कृतिर्जाता यथेच्छसि तथा कुरु ।।२६।।**
**एवं तन्निश्चयं ज्ञात्वा ब्राह्मणीं प्राह सद्गुरुः । संवादो नौ श्रुतः साध्वि तथा निर्व्याजमाचर ।।२७।।**

हृतः अर्थः योनि+अन्तरे अस्ति। किंतु असौ अत्र फलभागिनी दरिद्रवंशे प्राप्ता। अतः धनं कुतो लभ्येत्?२३। (हे) प्रेत, अतः तया शक्त्या और्ध्वदेहिकं कर्म कारयित्वा त्वत्+गोत्राय कस्मैचित् विप्राय यथालभ्यं धनं दापयित्वा ते मोक्षं ददामि खलु। इदं त्वां न रोचते चेत् तां (अहं) रक्षामि। (त्वं) स्वेच्छया आचर।२५। पिशाच उवाच। '(हे) देवदेव! त्वत्+पाद+अब्ज+विलोचनात् (अहं) कृतार्थः अस्मि। अद्य मम निष्कृतिः जाता। यथा इच्छसि तथा कुरु।'२६। एवं तत्+निश्चयं ज्ञात्वा सद्गुरुः ब्राह्मणीं प्राह। (हे) साध्वि, नौ संवादः (त्वया) श्रुतः। तथा निर्व्याजं आचर।२७।

तिने तुझ्याकडून पूर्वजन्मी हिरावलेल्या शंभर रौप्यमुद्रा तर त्याच जन्मांत राहिल्या. आतां ह्या जन्मांत त्या अपहाराच्या पापाचे फळ ही भोगत असल्याने बिचारी दरिद्री कुळांत जन्मली आहे. मग तिला कुठून एवढे पैसे मिळणार?२३. अरे समंधा, एवढ्यासाठी ह्या ब्राह्मणीकडून यथाशक्ती तुझे अंत्यसंस्कार करवून आणि तुझ्या गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला तिला शक्य असेल तेवढे पैसे देववून मी तुला या योनीतून नक्की मुक्त करीन.२४. तुला हे पटत नसेल तर तुला वाटेल ते तूं कर! मी ह्या सतीचे रक्षण करीन.२५. तो समंध म्हणाला, 'देवाधिदेवा दत्तात्रेया! आपल्या चरणकमलांच्या दर्शनाने मी कृतकृत्य झालो आहे. माझ्या पापकर्माची निष्कृती झाली आहे. आपण आपल्या इच्छेनुसार काय ते करावे.'२६. असा त्या पिशाचाचा निश्चय जाणून त्या ब्राह्मणस्त्रीला सद्गुरू म्हणाले, 'हे सती, तूं आमचा संवाद ऐकलास. त्याप्रमाणे ह्या ब्राह्मणाचे क्रियाकर्म निष्कपटपणे कर.'२७.

**तेनासौ सद्गतिं यायाद्वंशवृद्धिश्च ते भवेत् । उक्त्वैवं ध्यानगम्योऽभूद्धरिर्बुद्धाऽभवत्सती ।।२८।।**
**पत्ये शशंस तत्सर्वं तथैवाचीकरत्क्रियाम् । तया प्रेतो गतिं लेभे साप्यपापा बभूव ह ।।२९।।**
**अपरेऽहनि तत्स्वप्ने फले विन्यस्य चांशुके । तामाह भोजयित्वाऽजो विप्रान्भुङ्क्ष्व फलेत्विति ।।३०।।**
**प्रबुद्धापि फले दृष्ट्वा भोजयित्वा द्विजान् फले । कान्तेन साकं बुभुजे ततोऽभूद्गर्भिणी सती ।।३१।।**

तेन असौ सद्गतिं यायात्। ते वंश+वृद्धिः च भवेत्। एवं उक्त्वा हरिः ध्यान+गम्यः अभूत्। सती बुद्धा अभवत्।२८। तत् सर्वं पत्ये शशंस। तथा एव क्रियां आचीकरत्। तया प्रेतः गतिं लेभे। सा अपि अपापा बभूव ह।२९। अपरे अह्नि तत्+स्वप्ने अंशुके फले विन्यस्य च अजः तां आह, विप्रान् भोजयित्वा फले भुङ्क्ष्व।३०। (सा) प्रबुद्धा अपि फले दृष्ट्वा, द्विजान् भोजयित्वा कान्तेन साकं फले बुभुजे। ततः सती गर्भिणी अभूत्।३१।

त्या तूं केलेल्या क्रियाकर्मानि ह्या पिशाचाला सद्गती लाभेल आणि त्याची पीडा जाऊन तुझा वंशही वाढेल.' असे बोलून भगवान् ध्यानगम्य - म्हणजे अदृश्य झाले आणि ती सती जागी झाली.२८. ते सर्व स्वप्न त्या स्त्रीने आपल्या पतीले निवेदन केले. त्याप्रमाणेच त्यांनी सर्व कर्म केले. त्यायोगे त्या पिशाचाचे प्रेतत्व परिहरून तो उत्तम लोकांला गेला. ती सतीही पापरहित झाली. वरील आख्यानाद्वारा कठोपनिषदांत (१:१:२०) नचिकेताने यमाला विचारलेल्या प्रश्नांत 'मृत्यूनंतर जीव असतो असे कुणी म्हणतात तर नसतो असे कांही म्हणतात' या दोन मतांतील, मृत्यूनंतर जीवाला अस्तित्व नसते असे मत खोडून काढले आहे. कठोपनिषदांतच पुढे (२:२:७) जीव आपापल्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार स्थावर किंवा जंगम योनीत जातात असे प्रतिपादन केले आहे.२९. दुसऱ्या दिवशी तिच्या पदरांत दोन नारळ घालून श्रीगुरूंनी तिला सांगितले की 'ब्राह्मणभोजन घालून ही फळे तुम्ही दोघे खा.'३०. जागी झाल्यावरही आपल्या पदरांत फळे पाहून तिने श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ब्राह्मणांना जेवायला घालून ती फळे आपल्या पतीसह भक्षण केली. त्या फळप्रसादाच्या प्रभावाने ती ब्राह्मणी गर्भवती झाली.३१.

**काले दत्तप्रसादेन सूर्याचन्द्रमसाविव । पुत्रावसूत विप्रोऽपि जातकर्मादिकं व्यधात् ।।३२।।**
**ततोऽष्टमेऽब्दे ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा । सम्भाराः संभृताः पित्रा तदाद्भुतमिवाभवत् ।।३३।।**
**अकस्मात्सन्निपातेन ज्येष्ठपुत्रो ममार हि । उच्चै रुरोद तन्माता कोरस्ताडनपूर्वकम् ।।३४।।**

दत्तप्रसादेन काले (सा सती) सूर्या+चंद्रमसौ इव पुत्रौ असूत। विप्रः अपि जात+कर्मादिकं व्यधात्।३२। ततः ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा पित्रा सम्भाराः सम्भृताः। तदा अद्भुतं इव अभवत्।३३। ज्येष्ठपुत्रः अकस्मात् सन्निपातेन ममार हि। तन्+माता उच्चैः क+उरस्+ताडन+पूर्वकं रुरोद।३४।

श्रीदत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने त्या सतीला सूर्य-चंद्रसदृश जुळे मुलगे झाले. तिच्या पतीने शास्त्राप्रमाणे जन्माच्या संबंधीची कर्मे केली.३२. पुढे ज्येष्ठ (जुळ्यांतील नंतर जन्मलेल्या) पुत्राच्या मौंजीबंधनासाठी वडिलांनी सर्व सामुग्री जमवून तयारी केली असतां त्या वेळी एक नवलच घडले.३३. तो थोरला भाऊ अचानक सन्निपाताने मरण पावला. सन्निपात म्हणजे तीनही दोषांचा एकदम प्रकोप होणे. त्यामुळे अभिन्यास नांवाचा अत्यंत गंभीर असा ज्वर होतो. श्रीस्वामि महाराजांनी इथे माधवनिदानांतील ज्वरनिदानांतील श्लोक उद्धृत केले आहेत. शरीराचे तापमान खूप वाढून, सर्व ज्ञानेंद्रियांची (घ्राण, नेत्र, कान इत्यादि) शक्ती क्षीण होते. रोगी एकाच जागेवर निश्चल पडून राहतो. उशीवर डोके बडवून घेतो. सारखा कुशी बदलतो. कधी तरी थोडेसेच बोलतो. इत्यादि लक्षणे सांगितली आहेत. चरकसंहितेत याला अभिषंगज्वर असे म्हटले आहे. तो काम, शोक, भय, क्रोधांनी अभिभूत झालेल्या व्यक्तीला होतो. भूत-पिशाचांच्या अभिषंगानेही तो होतो असे तिथे म्हटले आहे. अशा भयानक विकाराने ग्रस्त झालेला त्या मुलाची वाणी छांदोग्योपनिषदांत (६:८:६) सांगितलेल्या क्रमाने मनांत विलीन झाली, मन प्राणांत, प्राण तेजांत, तेज परदेवतेत विलीन झाले. अंती तो बिचारा मुलगा हात-पाय वेडेवाकडे करीत, मर्मस्थानांच्या नाशाने प्राणांचे उत्क्रमण होऊन सर्व इंद्रियांच्या लयाद्वारे मरण पावला. त्याची माता मस्तक आणि ऊर पिटीत जोरजोराने रडूं लागली.३४.

### ।। ब्राह्मण्युवाच ।।

**हा पुत्र क्व गतोसि त्वं पयो मे स्रवते वृथा । कति शेषेऽचिरं वत्स बुद्ध्यस्वेदं पयः पिब ।।३५।।**
**भोजनावसरोऽयं ते भुक्त्वा रन्तुं चराङ्गणे । वयस्या आह्वयन्ति त्वामुत्तिष्ठोत्तिष्ठ मा स्वप ।।३६।।**
**त्वं नोत्तिष्ठसि चेत्प्राणांस्त्यक्ष्याम्यग्रे तवाधुना । जाता ये पञ्चपुत्रा मे तेषां त्वं प्राणवन्मम ।।३७।।**

ब्राह्मणी उवाच। 'हा पुत्र! क्व गतः असि? मय पयः वृथा स्रवते। कति शेषे? (हे) वत्स! अचिरं बुद्ध्यस्व। पयः पिब।'३५। 'अयं ते भोजन+अवसरः। वयस्याः त्वां रन्तुं आह्वयन्ति। भुक्त्वा अङ्गणे चर। उत्तिष्ठ, उत्तिष्ठ, मा स्वप।३६। अधुना त्वं न उत्तिष्ठसि चेत् तव अग्रे प्राणान् त्यक्ष्यामि। ये मे पंच पुत्रा जाता तेषां त्वं मम प्राणवत्।३७।

ती माता रडतां रडतां पुत्राला उद्देशून बोलूं लागली. 'अरे बाळा, कुठे रे गेलास तू? हे पाहा माझे दूध व्यर्थ वाहून जाते आहे. किती झोपतोस? माझ्या राजा, राजा रे, राजुड्या, लवकर ऊठ, हे वायां जाणारे दूध पी!' 'अरे तुझी जेवायची वेळ झाली आहे. हे तुझे सवंगडी बघ तुला खेळायला बोलावीत आहेत. जेवून त्यांच्याबरोबर अंगणांत खेळायला जा. ऊठ! ऊठ! असा झोपू नकोस!३६. आता जर तू उठला नाहीस तर मी तुझ्यापुढेच जीव देईन. मला जे पाच पुत्र झाले त्यांत तूं माझा जीव की प्राण आहेस.३७. तूं मेलास तर मीही मरून जाईन, कारण तूच माझा प्राण आहेस! बाळा, अगदी गर्भधारणेपासून आजपर्यंत मला तू कांहीसुद्धा त्रास दिला नाहीस. ३८.

**मृते त्वयि मरिष्ये मे यतः प्राणोऽसि केवलम् । रे दोहदप्रभृत्यद्य यावद्दुःखं न दापितम् ।।३८।।**
**गर्भे नष्टास्त्रयोऽर्भास्तद्दुःखं त्वन्मुखवीक्षणात । मया विस्मृतमद्याक-सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि ।।३९।।**
**धर्मोऽयं ते न वार्धक्ये त्राता नौ पुत्र को वद । एवं तद्रुदितं श्रुत्वा तत्रत्या ऊचुरेत्य ताम् ।।४०।।**
**किं शोचसि वृथा भीरु मृत्युर्देवर्षिदानवान् । न विस्मरति कालेऽपि मनुष्याणां तु का कथा ।।४१।।**
**अवतारा येऽवतीर्णास्तेऽपि कालवशं गताः । एवं सति वृथा शोकं त्वं मा कुरु विचारय ।।४२।।**

त्वयि मृते मरिष्ये, यतः केवलं प्राणः असि। रे! दोहद+प्रभृति अद्य यावत् दुःखं न दापितम्।३८। त्रयः अर्भः गर्भे नष्टाः तत् दुःखं त्वन्+मुख+वीक्षणात् मया विस्मृतम्। अद्य अक+सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि?'३९। अयं ते न धर्मः। (हे) पुत्र! वार्धक्ये नौ कः त्राता वद। एवं तत्+रुदितं श्रुत्वा तत्रत्या एत्य तां ऊचुः।४०। '(हे) भीरु, वृथा किं शोचसि? मृत्युः काले देव+ऋषि+दानवान् न विस्मरति। मनुष्याणां तु का कथा?४१। ये अवताराः अवतीर्णाः ते अपि कालवशं गताः। एवं वृथा शोकं मा कुरु। विचारय।'४२।

माझी तीन बाळे गर्भांतच नाश पावली. ते दुःख मी तुझ्याकडे पाहून विसरले. आतां मला दुःखाच्या सागरांत बुडवून कुठे निघालास?३९. आमचा असा त्याग करणे हा तुझा धर्म नाही. आम्हां मायबापांना म्हातारपणी कोण दुसरा सांभाळणारा आहे, सांग बरे! इहलोकांत किंवा परलोकांत पुत्राशिवाय कुणीच त्राता नाही याविषयी श्रीस्वामिमहाराजांनी ऐतरेय ब्राह्मणांतील मंत्राचा (पराकाशांत पुत्रच ज्योतिःस्वरूप आहे. पितर पुत्रामुळेच गाढ अंधःकाराला ओलांडून जातात..' ७:३:१) दाखला दिला आहे.४०. 'भयशीले (स्त्रिये), व्यर्थ कां शोक करतेस? काळ आला की मृत्यू देव, ऋषी वा दैत्य यांनासुद्धां विसकरत नाही (सोडत नाही), मग मनुष्यांची ती काय गोष्ट?४१. रामकृष्णादिक अवतारांचाही यथाकाल नाश झालाच ना? असा व्यर्थ शोक न करता तू नश्वर देह आणि चिरंतन आत्मा यांचा विचार कर.'४२.

॥ सोवाच ॥

**अहो बत पिशाचोत्थं दूरीकृत्य भयं हि मे । येन देवेन यद्दत्तं फलं तद्विफलं कथम् ॥४३॥**
**यदि तस्य मृषा वाक्यं तं भजन्ति कुतोऽपरे । बिभीषणध्रुवमुखैर्मन्तव्यं तदृतं कथम् ॥४४॥**
**लोकान्तरे नयाम्येतां तत्कीर्तिं सूनुना सह । एवं रुदित्वा संस्कर्तुं न ददौ शवमङ्गना ॥४५॥**
**ग्रामे तु भोजनाभावाल्लोकास्त्रस्तास्तदैत्य हि । यदृच्छयाऽब्रवीद्वाग्मी जटिलस्तापसः सतीम् ॥४६॥**

सा उवाच। 'अहो बत पिशाच+उत्थं भयं दूरीकृत्य येन देवेन यत् फलं दत्तं तत् कथं विफलं (जातम्)?४३। यदि तस्य वाक्यं मृषा तं अपरे कुतो भजन्ति? बिभीषण+ध्रुव+मुखैः तत् कथं ऋतं मन्तव्यम्?४४। एतां तत्+कीर्तिं सूनुना सह लोकान्तरे नयामि।' अवं रुदित्वा अङ्गना शवं संस्कर्तुं न ददौ।४५। ग्रामे तु भोजनाभावात् लोकाः त्रस्ताः। तदा हि जटिलः तापसः वाग्मी यदृच्छया एत्य सतीं अब्रवीत्।४६।

ती माता म्हणाली, 'अहो काय सांगूं, पिशाचबाधेचा परिहार करून ज्या देवाने हे फळ दिले ते कसे नाश पावले?४३. जर त्या भगवंताचेच वचन मिथ्या झाले तर इतर लोक कसे त्याला भजतील? बिभीषण, ध्रुव इत्यादि भक्तांनी तरी ते कसे खरे मानावे?४४. ही त्याची कीर्ती ह्या माझ्या बाळासह स्वर्गादि लोकांत घेऊन जाते.' अशा प्रकारे विलाप करीत ती स्त्री आपल्या पुत्राचे शव अंत्यसंस्कारांसाठी देईना.४५. प्रेतसंस्काराशिवाय गांवात कुणालाही जेवतां आले नाही आणि सगळे लोक त्रासून गेले. त्या वेळी एक वाक्पटु जटाधरी तापसी अचानक तिथे आला आणि त्या सतीला उद्देशून बोलूं लागला.४६.

**।। तापस उवाच ।।**

**किं शोचसि मुधा साध्वि शोकस्याविषयं सुतम् । सुतस्तवैष देहो वा जीवो वा ब्रूहि सारतः ।।४७।।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयो देहोऽयं पुरतस्तव । जीवोऽजः सर्वगोऽनन्तः कोत्र शुग्विषयो वद ।।४८।।**

तापस उवाच। '(हे) साध्वि), किं मुधा शोचसि? सुतं शोकस्य अविषयम्। तव सुतः देहो वा जीवो वा सारतः ब्रूहि।४७। अयं त्वग्+रक्त+मांस+अस्थिमयः देहः तव पुरतः। जीवः अजः सर्वगः अनन्तः। अत्र कः शुग्+विषयः? वद।४८।

तो तापसी म्हणाला, 'हे सती, का उगीच विलाप करते आहेस? हा मुलगा शोकाचे कारण होऊच शकत नाही. मला सांग, तुझा मुलगा हा तुझ्यासमोरचा देह आहे कां त्याला सोडून गेलेला जीव आहे? अगदी विचार करून बघ!४७. हा त्वचा, रक्त, मांस, अस्थी यांचा अन्नमय, प्राणमय आदि सहा कोशांचा बनलेला देह तुझ्यापुढेच आहे. तो तुझ्याजवळच असल्याने त्याचा शोक करण्याचे कांहीच कारण नाही. सहा कोशांच्या पुरचुंडीहून वेगळा असा जीव ज्याच्यामुळे ही जड (अचेतन) पुरचुंडी सचेतनासारखी भासते तो तुझा मुलगा असे म्हणशील तो परमेश्वराचा अंश आहे, जन्ममरणादि विकारशून्य आहे. सर्वव्यापी आहे. तो आत्मा असल्याने ब्रह्मरूपच आहे. आत्म्याच्या दोन अवस्था आहेत. १. व्यवहारविशिष्ट २. केवल. व्यवहारही स्वप्न, जागृती आणि सुषुप्ती असा तीन प्रकारांचा आहे, कैवल्योपनिषदानुसार (१:१३).

१. **सुषुप्ती**त (गाढ निद्रा) तमोगुणाच्या प्रभावाने सर्व उपाधींचा विलय होऊन परमानंदरूप ब्रह्मच होतो. ('*आप्नोति इति आत्मा.*')

**कालकर्मगुणोत्पन्नं जगन्मायामयं त्विदम् । कथं ध्रुवं हि मन्तव्यं यथा कर्मैन्द्रजालिकम् ।।४९।।**
**कालकर्मगुणाद्युत्थ-देहिनः स्वत्वकल्पना । पुत्रादिरूपा मिथ्यैषा नद्यां काष्ठौघवच्चला ।।५०।।**

इदं मायामयं जगत् तु काल+कर्म+गुण+उत्पन्नं यथा ऐन्द्रजालिकं कर्म, कथं हि ध्रुवं मन्तव्यम्?४९। एषा काल+कर्म+गुण+आदि+उत्थ+देहिनः पुत्र+आदि+रूपा स्वत्व+कल्पना मिथ्या, नद्यां काष्ठ+ओघवत् चला।'५०।

२. वाचा, हात, पाय इत्यादि इंद्रियांचा उपशम झाल्यावर येणाऱ्या **स्वप्न** या अवस्थेत तीत गिरी, नदी, समुद्र, मनुष्य, पशु इत्यादि सर्व लौकिक पदार्थांचा वासनारूप अंश घेऊन, जागृतावस्थेतील अभिमानाचा स्वतःच नाश करून, एक जगतच आपल्या अंतःकरणाने निर्माण करून, आपल्या चैतन्याने त्या कल्पित पदार्थांना रूप देऊन, जागृत अवस्थेतील वासना त्यांत आणणारा तो आत्मा (*'आदत्ते इति आत्मा'*). बृहदारण्यक उपनिषदांत (४:३:९) याचे असे वर्णन केले आहे. स्वप्नावस्थेत जीवात्मा ह्या भौतिक जगांतल्याच सर्व पदार्थांचे अंश घेऊन, आपणच त्या सर्व विस्कटून स्वतःच पुन्हां उभ्या करतो; आणि स्वतःच्याच तेजाने स्वतःच्याच प्रकाशांत स्वप्न पाहतो.

३. **जागृत** अवस्थेत नेत्रादि इंद्रियांच्या माध्यमांतून बाह्य विषयांचा भोग घेतो (*'अत्ति इति आत्मा'*) ही उपाधिविशिष्ट आत्म्याची तिसरी अवस्था आहे. कैवल्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणे तो स्त्री, अन्न, पान इत्यादि विचित्र भोगांनी परितृप्त होतो.'

उपाधिरहित **केवल आत्मा** सतत जाणारा तो आत्मा (*'अतति इति आत्मा'*). हाच ऐतरेय आरण्यांत *'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म'* असा वर्णिलेला आहे. अनंत म्हणजेच देश-काल-वस्तू ह्या परिच्छेदांनी रहित. जीव आणि अनंत ह्या दोन्हींचे एकत्व दर्शवून अजन्मा, सर्वगामी या आधीच्या विशेषणांची पुष्टीच होते. अशा रीतीने देह आणि जीव यांच्यात शोक कुणाचा करतेस ते सांग या प्रश्नांतच नकारार्थी उत्तर अभिप्रेत आहे.४८. श्रीगुरू पुढे सांगत आहेत. हे दृश्य जग त्रिगुणात्मक मायेपासून झालेले आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांना क्षोभवणारा काल आहे. आणि जीवांच्या उत्पत्तीला कारण त्यांचे कर्म असते. असे हे गारुड्याच्या इंद्रजालासारखे जग शाश्वत कसे मानतां येईल?४९. काल, कर्म, गुण यांच्यापासून उद्भवलेल्या ह्या जीवाविषयी जी 'हा माझा मुलगा' अशी आत्मीयता तुला वाटते ती मिथ्या आहे. फसवी आहे. नदीत वाहणाऱ्या लाकडांच्या समूहासारखी अस्थिर आहे.५०.

**त्वया ध्रुवा मतेयं चेद्वद पूर्वापरोद्भवे । कस्य त्वं जननी स्त्रीर्वा के वा सम्बन्धिनस्तव ।।५१।।**
**जन्ममृत्यू कालवशादलङ्घ्यौ दिनरात्रिवत् । शरीरिणोऽङ्गे बाल्यादि यथा देहान्तरं तथा ।।५२।।**
**गुरुप्रसादाद्यततो भ्रमोऽयं लीयतेऽचिरात् । तेनर्ते मृत्यवे कल्प्यो जातो वै जनुषे मृतः ।।५३।।**

इयं त्वया ध्रुवा मता चेत् वद पूर्व+अपर+उद्भवे त्वं कस्य जननी? स्त्रीः वा? के वा ते सम्बन्धिनः?५१। जन्म+मृत्यू कालवशात् दिन+रात्रिवत् अलंघ्यौ। शरीरिणः अङ्गे यथा बाल्यादि तथा देहांतम्।५२। गुरुप्रसादात् यततः अयं भ्रमः अचिरात् लीयते। तेन ऋते जातः वै मृत्यवे कल्प्यः मृतः जनुषे।५३।

तरीही तुला वाटणारी आपुलकी खरी आणि कायमची मानलीस तर मग सांग बरं तू पूर्वीच्या किंवा पुढच्या जन्मी कुणाची आई वा स्त्री होतीस आणि होणार आहेस? कोण कोण तुझे नात्यांतले होते आणि होतील?५१. 'जीवासाठी मी शोक करीत नाही, त्याच्या जन्म-मृत्यूमुळे होणाऱ्या दुःखाने शोक होतो' असे तू म्हणशील तर जसा दिवस संपला की रात्र येते आणि रात्रीनंतर पुन्हा दिवस, तसेच जन्म आणि मृत्यू कालाधीन आहेत. ते टाळतां येत नाहीत. देहाभिमानी जीवाला त्याच्या शरीराच्या बाल्यादि अवस्था नेमलेल्याच असतात (*'देहिनेऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यते।।'* भ.गीता २:१३). 'जो अल्पवयस्क आणि अशक्त असा बालक मी होतो तोच मी प्रौढ आणि बलवान झालो आहे', ही जशी जाणीव असतेच; किंवा नवजात बालकाची पूर्वजन्मीची सर्व स्मृती नष्ट झालेली असूनही स्तन चोखण्याची प्रवृत्ती मात्र असते. तरीही जीवाविषयीची आपुलकी हा अविवेकी लोकांना वाटणारा भ्रमच आहे.५२. सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने जो प्रयत्नशील राहतो त्याचा भ्रम मात्र लवकरच विरून जातो. यततः म्हणजे शेवटच्या श्वासापर्यंत यत्नशील. ब्रह्मसूत्रांतील प्रतिपादनानुसार (४:१:१२) उपासना मृत्यूच्या क्षणापर्यंत चालूं राहिली पाहिजे. मात्र गुरुकृपेशिवाय जन्मला आलेला मृत्यू पावणार आणि मेलेला पुन्हां जन्माला येणार हे अटळ आहे (*'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च। तस्मादपरिहार्येर्थे न त्वं शोचितुमर्हसि।।'* भ.गीता २:२७). 'ह्या जन्मी नाही भ्रम गेला तर नसूं दे; पुढच्या जन्मी जाईल! पुढचा जन्म येणारच आहे की.'

**नार्यतोऽपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि । मृतः शुचा पुनर्नैति नाप्युपायान्तरायुतैः ।।५४।।**

**।। सोवाच ।।**

**न वेदान्तार्थतत्त्वादि रोचते येन मेऽर्पितम् । सुफलं तत्कुतो यातं विश्वस्तव्यः स कैर्भुवि ।।५५।।**

अतो (हे) नारि, त्वं अपरिहार्येर्थे शोचितुं न अर्हसि। मृतः शुचा, उपाय+अंतर+अयुतैः वा पुनः न एति। ५४। सा उवाच। वेदान्त+तत्त्व+अर्थ (मे) न रोचते। येन मे सुफलं अर्पितं तत् कुतः यातम्? सः भुवि कैः विश्वस्तव्यः?५५।

असे कुणी म्हणेल तर ते खरे नाही. आपण केलेल्या कर्माच्या प्रचंड पसाऱ्यांत भोग्य कर्मे किती तरी असतात. त्यांचा भोग भोगण्यासाठी कोट्यवधी अधोयोनि आणि देवादिक ऊर्ध्वयोनीत जीव फिरत असतो. त्या असंख्य फेऱ्यांत क्वचितच मनुष्यदेह लाभतो. असा मनुष्यदेह लाभला तरी त्यांत सगळी इंद्रिये पटु असणे हे विपुल पुण्याची जोड असेल तरच शक्य आहे. गरुडपुराणानुसार (धर्मकांड-प्रेतकल्प १:५) सर्व इंद्रियांनी संपन्न असा देह बहु पुण्यानेच लाभतो. पंगु, अंध इत्यादि देहांत किंवा कोळी, भिल्ल, यवन, म्लेच्छ, इत्यादि वंशांत जन्म आला तर परमार्थाचा गंधही लाभणार नाही. अगदी अधिकारी ब्राह्मण देहही मिळाला तरी मातेच्या कुशीत मल-मूत्र-वात-पित्त-कफादींनी बरबटलेल्या, रेत आणि रक्ताच्या संयोगाने झालेल्या, अशुचि बीजापासून वाढलेल्या, वारेत गुंडाळलेल्या गर्भाची वाढ आईच्या खाण्यापिण्यांत आलेल्या रसांनीच होते. त्याची शक्ती, बल, प्रज्ञा, तेज, हालचाल सर्व कुंठित असतात. मुहूर्तमात्र सहन करायला अशक्य अशा ह्या अवस्थेत दहा महिने अगतिक अवस्थेत पडून राहून योनीद्वारा कष्टप्रद रीतने बाहेर पडायचे. म्हणून पुत्राच्या मृत्यूचा शोक टाकून ज्ञानासाठी यत्नशील असावे हा भावार्थ.५३. म्हणून बाई ग, तूं ह्या पुत्रमृत्यूसारख्या अटळ गोष्टीचा शोक करणे उचित नाही. मेलेला शोकाने, विलापाने किंवा इतर हजारो उपायांनीही परत येत नाही.५४. ब्राह्मणी म्हणाली, हा सगळा वेदांत आणि तत्त्वज्ञान माझ्या गळी उतरत नाही. ज्या दत्तगुरूंनी मला हे सुफल दिलं ते असं कसं गेलं? आतां त्यांच्यावर कोण विश्वास ठेवील?५५.

**।। साधुरुवाच ।।**

**यत्र त्वया वरो लब्धस्तत्र गत्वा सविस्तरम् । वरदं परिपृच्छेदं यास्येऽलं विस्तरेण भोः ।।५६।।**
**तच्छ्रुत्वा शवमादाय सद्गुरोराश्रमं ययौ । तत्र पादुकयोः शीर्षं ताडयामास भामिनी ।।५७।।**

साधुः उवाच। भोः, यत्र त्वया वरः लब्धः तत्र गत्वा वरदं इदं सविस्तरं परिपृच्छ्। विस्तरेण अलम्।५६। तत् श्रुत्वा शवं आदाय सद्गुरोः आश्रमं ययौ। तत्र भामिनी पादुकयोः शीर्षं ताडयामास।५७।

तेव्हां तो साधू म्हणाला, जिथे तुला पुत्रप्राप्तीचा वर मिळाला तिथे जाऊन वर देणाऱ्या हरीलाच तूं हे सर्व विचार. मी आतां अधिक कांही न बोलतां जातो.५६. ते त्या साधूचे बोलणे ऐकून ती सती आपल्या पुत्राचे ते शव घेऊन सद्गुरूंच्या मंदिराला गेली. शोक आणि संतापाने तापलेल्या त्या स्त्रीने तिथे पादुकांवर डोके आपटून घेतले.५७. अशा प्रकारे तिने संध्याकाळपासून रात्रीपर्यंत शोक केला आणि अंत्यसंस्कारासाठी ते प्रेत दिले नाही. त्यामुळे वाट पाहून ब्राह्मण घरी गेले. ते दोघे पती-पत्नी मात्र तिथेच राहिले.५८.

**प्राण -** थोड्या वेळाने रात्री तिला झोप लागली. स्वप्नांत तिला श्रीगुरूंचे दर्शन झाले. ते तिला म्हणाले, 'बाई, मी काय तुझे काय अहित केले आहे?' 'तो' (**सः**) असा वेदांनी अपरोक्षत्वाने निर्देशिलेला वायू म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदानुसार (३;७:२) सर्वज्ञत्वादि स्वरूपलक्षणयुक्त अंतर्यामी, सर्व जीव आणि जग यांच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचे कारण असणारा ईश्वर होय. 'हा' (**एष**) शब्दाने अपरोक्ष, स्वयंप्रकाश प्रत्यगात्मा (जीवात्मा) म्हणजेच प्राण. प्राण हा शब्द अन ह्या चलनार्थी धातूपासून झालेला आहे. तो कसा आत्मा होईल? या आक्षेपाला छांदोग्य उपनिषदाच्या सातव्या अध्यायांत सनत्कुमारांनी नारदाला केलेल्या उपदेशाचा आधार घेतला आहे. नामापासून सुरुवात करून क्रमाक्रमाने वाग्, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप, तेज, आकाश, स्मृती आणि आशा

**एवं निशीथादासायं शुशोच न ददौ शवम् । संस्कर्तुं स्वालयं विप्रा जग्मुस्तत्रैव दम्पती ।।५८।।**
**ततो निशीथे सुष्वाप साध्वी स्वप्ने ददर्श सा । श्रीगुरुं प्राह सोऽप्येनां किं मयापकृतं हि ते ।।५९।।**

एवं आसायं निशीथात् शुशोच। शवं संस्कर्तुं न ददौ। विप्राः स्व+आलयं जग्मुः। दम्पती तत्र एव तस्थुः।५८। ततः निशीथे साध्वी सुष्वाप। सा स्वप्ने श्रीगुरुं ददर्श। सः अपि एनां प्राह, मया ते किं अपकृतं हि।५९।

हे उत्तरोत्तर कार्यकारणभावाने तसेच निमित्तनैमित्तिकभावाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत असे सांगून अंती आशेपेक्षांही प्राण श्रेष्ठ आहे असे सोदाहरण प्रतिपादन केले आहे. सर्व क्रिया, कारक, फल, भेद हे प्राणच आहेत हे सांगतांना, प्राणच प्राणाने चालतो, प्राणच प्राण देतो, प्राणच प्राणाला देतो; पिता प्राण, माता प्राण, भ्राता प्राण, बहीण प्राण, प्राणच आचार्य, प्राणाच्या व्यतिरिक्त कांहीच नाही असे स्पष्ट करण्यासाठी तिथे पुढे म्हटले आहे की 'आई, वडील, भाऊ, बहीण, गुरु इत्यादींचे प्राण असतील तर त्यांना दुरुत्तरे करणाऱ्याचा लोक पितृघाती, मातृघाती, गुरुघाता इत्यादि विशेषणांनी धिक्कार करतात. परंतु त्याच मातापितरादींना प्राण सोडून गेल्यावर त्यांना जाळून टाकणाऱ्याला मात्र मातृघातकी, पितृघातकी असे धिक्कार ऐकावे लागत नाहीत.' अशा रीतीने, 'प्राणच हे सर्व कांही आहे,' हे पाहणारा, विचार करणारा, समजून घेणारा अतिवादी - सर्वश्रेष्ठ तत्त्व जाणणारा होतो.

इथे कुणी असा आक्षेप घेईल की शंकराचार्यांनी शतश्लोकींत (२८) प्रतिपादल्याप्रमाणे जन्माच्या वेळी आत्मा येत नाही किंवा मृत्यूच्या वेळी जात नाही, तो अखण्ड असतो; (*'नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यन्तकाले यत्सोऽखण्डोऽस्ति लैङ्गं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक्। तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किन्तु*

**प्राणो नामैष वायुः स बहिर्यातो मुहुर्मया । आनीय पूर्ववन्न्यस्तस्त्यजातः शुचमङ्गने ।।६०।।**

एष प्राणः नाम वायुः सः बहिः यातः। स मया मुहुः आनीय पूर्ववत् न्यस्तः। अतः, हे अङ्गने, शुचं त्यज।६०।

*संस्कारजातैः तेजोमात्री गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैस्सहैव।।२८।।'*) येणे-जाणे इत्यादि लिङ्गदेहापुरते असते. तर मग प्रत्यगात्मा आला किंवा गेला असे कसे म्हणतां येईल? प्रश्नोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार रथचक्राच्या अरा जशा नाभीशी जुडलेल्या असतात तसेच ह्या इंद्रिये, मन आदी यांचा संघात असलेल्या देहांत प्रज्ञात्मा प्रवेश करून त्या सर्वांच्या नामरूपांची अभिव्यक्ती करतो. हा अनुप्रवेश आरशांत होणाऱ्या बिंबाच्या प्रवेशासारखा असतो. ते प्रतिबिंब आणि बिंब जसे एकरूप असतात तसेच जीव आणि आत्मा जाणावेत. हा जीवाविना सर्व मृत होतात; पण जीव कधीच मरत नाही (छां.उ. ६:११:३). ज्या जीवाच्या वियोगाने मृत्यू होतो त्यालाच तो जीव म्हणजे प्राण बाहेर गेला असे श्रीगुरू म्हणतात. 'तो गेलेला प्राण मी आणून पूर्ववत् जागच्या जागी ठेवला आहे. आतां तो मृत नाही. तेव्हां आतां तूं शोक सोड.' असे श्रीगुरू त्या सतीला म्हणाले. इथे गेलेले प्राण परत आणण्याविषयी सुबंधूचे प्राण त्याच्या भावांनी परत आणले तो दृष्टांत दिलेला आहे (शतश्लोकी २९). वाचा नसली तरी तो मुका म्हणून जिवंतच असतो. डोळे नसतील तर तो आंधळा झाला तरी जिवंतच असतो. कान गेलेला बहिरा जिवंतच असतो. इतकेच काय मन नसले तरी वेडा जिवंतच असतो. पण जीवा(प्राणा)शिवाय कुणी जिवंत असूं शकत नाही ह्या कौषीतकी उपनिषदाचे (३:३) वचन इथे उद्धृत केले आहे.६०.

**इति दृष्ट्वा विनिद्राऽभूद् ददर्शोत्थितमात्मजम् । हर्षशोकान्विता साध्वी प्रेम्णा भर्तारमाह्वयत् ।।६१।।**
**सोऽप्युत्थायात्मजं दृष्ट्वा रुदन्तं क्षुत्तृडाकुलम् । मन्त्रवत् त्रिरवघ्राय मूर्ध्न्यस्तौषीत्परात्परम् ।।६२।।**
**अत्रान्तरे प्रातरभूद् दग्धुं प्रापुः शवं द्विजाः । ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा सर्वं श्रुत्वाऽस्तुवन्हरिम् ।।६३।।**
**दम्पती तु ततः स्नात्वा प्रपूज्येशं सुविस्तरात् । नीराज्याभ्यर्च्य भूदेवान्जग्मतुर्निजमन्दिरम् ।।६४।।**
**विद्याविनयसंपन्नश्चिरजीवी स भाग्यभाक् । बभूवाप्येवमेवान्य आसन्पूर्णमनोरथाः ।।६५।।**

इति (स्वप्नं) दृष्ट्वा (सा) विनिद्रा अभूत्। उत्थितं आत्मजं ददर्श। हर्ष+शोक+अन्विता साध्वी प्रेम्णा भर्तारं आह्वयत्।६१। सः अपि उत्थाय रुदन्तं क्षुत्+तृड्+आकुलं आत्मजं दृष्ट्वा मूर्ध्निः मन्त्रवत् त्रिः अवघ्राय परात्परं अस्तौषीत्।६२। अत्र अंतरे प्रातः अभूत्। द्विजाः शवं दग्धुं प्रापुः। ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा, सर्वं श्रुत्वा हरिं अस्तुवन्।६३। ततः दम्पती तु स्नात्वा ईशं सुविस्तरात् प्रपूज्य नीराज्य भूदेवान् अभ्यर्च्य निजमन्दिरं जग्मुः।६४। सः विद्या+विनय+संपन्नः चिरजीवी भाग्यभाक् बभूव। अन्ये अपि एवं एव पूर्णमनोरथाः आसन्।६५।

असे सर्व स्वप्नांत पाहून ती साध्वी जागी होऊन पाहते तर तिचा मुलगा उठून बसला होता. ते पाहून तिच्या मनांतल्या शोकाची जागा आनंदाने घेतली. ओठांवर हसू आणि डोळ्यांत पाणी अशी कांहीशी तिची अवस्था झाली. तिने प्रेमाने आपल्या हांक मारली.६१. तिच्या पतीनेही उठून आपल्या भुकेने आणि तहानेने व्याकुळ होऊन रडणाऱ्या मुलाला पाहून जवळ घेतले आणि त्याच्या डोक्याचे मंत्राने अवघ्राण केले आणि परमेश्वराची स्तुती केली.६२. थोड्या वेळाने सकाळ झाली आणि गांवातील ब्राह्मणवर्ग मुलाचे शव दहन करण्यासाठी आले. तेव्हां मलगा जिवंत झालेला पाहून आणि सर्व वृत्तांत ऐकून त्यांनीही भगवंताची स्तुती आरंभिली.६३. त्यानंतर त्या जोडप्याने श्रीगुरूंच्या पादुकांची सविस्तर पूजा करून आरती केली, ब्राह्मणांची पूजा करून आणि त्यांना भोजन घातले. नंतर सर्वजण आपापल्या घरी परतले.६४. तो पुनरुज्जीवित पुत्र विद्या आणि विनयांनी संपन्न, दीर्घजीवी आणि भाग्यवंत झाला. दुसरेही अनेक भक्त याचप्रमाणे श्रीगुरूंच्या कृपेने आपल्या कामना पूर्ण करून घेऊन सुखी झाले.६५.

**तत्राऽश्रान्तं स जागर्ति श्रीनृसिंहसरस्वती । अद्य कालान्तरेऽप्येवं न निद्रात्यन्यवत्कलौ ।।६६।।**
**तत्रेशमाद्यं दृढभक्तियुक्ता भजन्ति ये केऽपि सदुक्तिसक्ताः**
**ते प्राप्नुवन्ति द्रुतमिष्टकामान्निदर्शनं त्वत्र सती सुकामा ।।१।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे प्रेतसंजीवनं नाम द्वादशोऽध्यायः ।।१२।।**

तत्र सः श्रीनृसिंहसरस्वती कालान्तरे अद्य अपि अश्रान्तं जागर्ति। कलौ अन्यवत् न निद्राति।६६। तत्र आद्यं ईशं ये के अपि सत्+उक्ति+सक्ताः दृढ+भक्ति+युक्ताः भजन्ति ते द्रुतं इष्ट+कामान् प्राप्नुवन्ति। अत्र निदर्शनं तु सुकामा सती।१।

त्या कृष्णातीरावर औदुंबराच्या छायी तो भक्तकामकल्पद्रुम श्रीनृसिंहसरस्वती श्रीगुरू, शेकडो वर्षांचा काळ लोटूनही आजही अविश्रांत जागतो आहे. कलियुगांतही अन्य देवतांप्रमाणे तो झोप घेत नाही.६६. (क्षेपक) जे कुणी संतांच्या वचनावर विश्वास ठेवून त्या पादुकांची दृढ भक्तीने उपासना करतात त्यांच्या ईप्सित कामना शीघ्रच पूर्ण होतात. इष्टार्थ पावलेली ती शिरोळची सती हे त्याचे एक उदाहरण आहे.१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा बारावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# त्रयोदशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**आसाद्य भगवान्भीमां ततः किमकरोत्प्रभुः । श्रद्दधानाय मे शंस दुर्ग्रहं तस्य चेष्टितम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गान्धर्वनगरे भीमामरजा संगमे शुभे । कृष्णापञ्चनदीयोग-तुल्ये तस्थौ जगत्प्रभुः ।।२।।**

**स्थित्वात्र गुप्तभावेन तत्रत्यब्राह्मणालयम् । गत्वा भिक्षां ययाचेऽसौ भक्तोद्धरणहेतवे ।।३।।**

नामधारक उवाच। भगवान् भीमां आसाद्य ततः प्रभुः किं अकरोत्? दुर्ग्रहं (अपि) तस्य चेष्टितं श्रद्दधानाय मे शंस।१। सिद्ध उवाच। कृष्णा+पंचनदी+योग+तुल्ये शुभे भीमा+अमरजा सङ्गमे गान्धर्वनगरे जगत्+प्रभुः तस्थौ।२। अत्र गुप्तभावाने स्थित्वा तत्रत्य+ब्राह्मण+आलयं गत्वा असौ भक्त+उद्धरण+हेतवे भिक्षां ययाचे।३।

**श्रीगणेशाय नमः। तेराव्यांत वांझ महिषी दुभवुनि घेई राजाची सेवा। ब्रह्मराक्षसा देउनि सद्गति दाविति सद्गुरु विश्वरूप यतीला।।** अशा रीतीने मागील अध्यायात तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच श्रीगुरूंचे भक्तवात्सल्यही दर्शविले. आता आपल्या आचरणांतून रागद्वेषरहित जीवन्मुक्त जगाला कसे पावन करतात ते दाखवून रागद्वेष न सुटलेला, जरी तो संन्यासी असला तरी, कृतार्थ होत नाही हे दाखविले आहे. नामधारक सिद्धमुनींना विचारतात, भगवान दत्तप्रभूंनी भीमातीराला येऊन काय लीला केली? खरोखर त्यांची लीला सामान्य मानवी बुद्धीला आकलन होण्यास कठीण आहे. तरीही श्रद्धेमुळे ती जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.१. सिद्ध मुनी उत्तरले, कृष्णा-पंचगंगा संगामासारख्याच पावन अशा भीमा-अमरजा संगमासन्निध गाणगापूरला सद्गुरूंनी वास केला.२. आपले माहात्म्य प्रकट न करतां तिथे संगमावरच राहून गाणगापूरांतल्या ब्राह्मणांच्या घरी भक्तांच्या उद्धारासाठीच ते भिक्षा मागीत असत, भूक शमविण्यासाठी नव्हे. कारण त्यांना तहान-भूक इत्यादि विकार नसतात.३.

**दीनभाविकसद्विप्र-दत्तभिक्षाप्रियं द्विजाः । श्रीविद्याढ्या हसन्ति स्म श्रीशं भक्तिप्रियं हरिम् ।।४।।**
**यथार्के प्रसरत्यभ्र-च्छन्नेऽपि द्योत इद्यथा । सम्पुटस्थितकस्तूरी-गन्धस्तद्वद्धरेर्गुणाः ।।५।।**
**एकदा दीनविप्रस्य गेहे च्युतरदां वशाम् । महिषीं प्रेक्ष्य स प्राह ब्राह्मणीं देहि मे पयः ।।६।।**
**सा प्राहेयं वशा भार-वाहिनी नासिकागुणा । योगक्षेममितोऽस्माकं जन्मतोऽपि लुलायवत् ।।७।।**
**मृषा मा वद तां दुग्ध्वा क्षीरं देहीति भाषिता । गुरुणापि वशां दुग्ध्वा काष्ठपात्रेऽलभत्पयः ।।८।।**

दीन+भाविक+सत्+विप्र+दत्त+भिक्षा+प्रियं श्री+ईशं भक्ति+प्रियं हरिं श्री+विद्या+आढ्याः द्विजाः हसन्ति स्म।४। अर्के अभ्र+च्छन्ने अपि यथा द्योत प्रसरति, (यथा वा) सम्पुट+स्थित+कस्तूरी+गंधः इत् तत्+वत् हरेः गुणाः प्रसरन्ति।५। एकदा दीन+विप्रस्य गेहे च्युत+रदां वशां महिषीं प्रेक्ष्य सः ब्राह्मणीं प्राह, मे पयः देही।६। सा प्राह, 'इयं वशा, भारवाहिनी, नासिका+गुणा। जन्मतः अपि लुलायवत्। इतो अस्माकं योगक्षेमम्।'७। 'मृषा मा वद। तां दुग्ध्वा क्षीरं देहि' इति गुरुणा भाषिता वशां अपि दुग्ध्वा काष्ठ+पात्रे पयः अलभत्।८।

लीन, भाविक आणि सदाचारी ब्राह्मणांचीच भिक्षा आवडीने घेणाऱ्या भक्तीचा चाहता अशा त्या लक्ष्मीपती हरीचा गाणगापुरांतील धनवान आणि सुविद्य आणि म्हणूनच गर्विष्ठ असलेले ब्राह्मण कुचेष्टेने उपहास करीत.४. ढगांनी आच्छादलेल्याही सूर्याचा प्रकाश जसा फांकतो, किंवा बंद डबीतील कस्तूरीचासुद्धां सुगंध दरवळतोच त्याचप्रमाणे श्रीगुरूंचे गुणही लवकरच प्रकट झाले.५. एकदा अशाच एका गरीब ब्राह्मणाच्या घरी श्रीगुरू भिक्षेला गेले असतां अन्न तयार नसल्याचे पाहून त्यांनी ब्राह्मणीला भिक्षेसाठी दाराजवळच बांधलेल्या, दांत पडलेल्या वांझ म्हशीची धार काढून दूध द्यायला सांगितले.६. ती गृहिणी म्हणाली 'अहो, ही वांझ म्हैस आहे. जन्मापासूनच आम्ही हिला रेड्यासारखी पोसली आहे. नाकांत वेसण घालून हिला ओझे वाहण्याच्या कामाला देतो. त्यावरच आमचा चरितार्थ चालतो.'७. त्यावर श्रीगुरू म्हणाले, 'उगीच खोटे बोलूं नकोस, (लवकर) तिची धार काढून मला दूध दे!' हे श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्या ब्राह्मणीने त्या वांझ म्हशीचीच धार काढायला घेतली. तो काय आश्चर्य, ते लाकडी भांडे दुधाने भरले!८.

**विस्मिता सार्पयत्तस्मै कोष्णं कृत्वा पयो मुदा । पीत्वा क्षीरं ययौ प्रेम्णा श्रीगुरुः संगमं द्रुतम् ।।९।।**
**तत एत्य गृहेशोऽदः श्रुत्वा सस्त्रीक एत्य तम् । गुरुं संपूज्य लब्धेष्ट-वरो हृष्टोऽन्वगाद्गृहम् ।।१०।।**
**अन्येद्युर्भारवाहार्थं वशामाहर्तुमागताः । कृषीवलाः प्रेक्ष्य दोहं शशंसुर्द्राङ् नृपाय तत् ।।११।।**
**नृपोऽप्याकर्ण्य विप्रात्तच्चतुरङ्गबलान्वितः । गुर्वर्थं राजचिह्नानि गृहीत्वा सङ्गमं ययौ ।।१२।।**
**तमेत्य प्रणिपत्योचे दण्डवद्गद्गदाक्षरः । पुलकाङ्कितदेहो राड् दीनं माम्पाहि किङ्करम् ।।१३।।**

सा विस्मिता पयः कोष्णं कृत्वा मुदा तस्मै अर्पयत्। श्रीगुरुः प्रेम्णा क्षीरं पीत्वा द्रुतं संगमं ययौ।९। ततः गृह+ईशः एत्य अदः श्रुत्वा गुरुं एत्य तं संपूज्य लब्ध+इष्ट+वरः हृष्टः गृहं अन्वगात्।१०। अन्ये द्युः भारवाहार्थं वशां आहर्तुं आगताः कृषीवलाः दोहं प्रेक्ष्य तत् द्राक् नृपाय तत् शशंसुः।११। नृपः अपि विप्रात् तत् आकर्ण्य चतुः+अंग+बल+अन्वितः गुरु+अर्थं राज+चिह्नानि गृहीत्वा संगमं ययौ।१२। तं एत्य दण्डवत् प्रणिपत्य गद्गद+अक्षरः पुलकाङ्कित+देहः राट् ऊचे, 'मां किङ्करं पाहि।'१३।

आश्चर्यचकित झालेल्या त्या स्त्रीने ते दूध किंचित् गरम करून श्रीगुरूंना दिले. त्यांनीही अत्यंत प्रेमाने ते पिऊन टाकले आणि लगेच ते संगमाकडे निघून गेले.९. कांही काळाने गृहस्वामी परतले आणि ही सर्व घटना पत्नीकडून ऐकली. लगेच तिला घेऊन ते संगमावर गेले आणि त्यांनी श्रीगुरूंची उत्तम प्रकारे पूजा केली. सद्गुरूंनी प्रसन्न होऊन त्यांना ईप्सित वर दिला आणि आनंदभरित होऊन ते दंपती आपल्या घरी परतले.१०. दुसऱ्या दिवशी कांही शेतकरी ओझे वाहण्यासाठी ती म्हैस घेऊन जायला आले असतां त्यांनी ती दुभती झाल्याचे पाहिले. ते ताबडतोब राजाकडे गेले आणि त्याला हा चमत्कार निवेदन केला.११. राजानेही ब्राह्मणाकडून सर्व खातरजमा करून घेतली आणि आपली चतुरंग सेना बरोबर घेऊन, श्रीगुरूंसाठी पालखी, छत्र-चामरादि राजचिह्ने घेऊन संगमावर आला.१२. ह्या भगवल्लीलेचे श्रवण करून त्या शुद्ध अंतःकरणाच्या राजाचा भक्तिभाव उफाळून आला आणि तो नम्रपणे त्यांच्याकडे आला. श्रीगुरूंजवळ येऊन राजाने दण्डवत घातला. त्याचे अष्ट सात्त्विक भाव उचंबळून आले. रोमांचित होऊन तो सद्गदित आवाजांत म्हणाला, 'ह्या दासाला पदरांत घ्या!'१३.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**दण्डी वनचरोऽस्म्यङ्ग भिक्षुस्त्वं सेनया सह । राजन्कस्मादिहानन्द-संरम्भादागतोऽसि किम् ।।१४।।**

**।। राजोवाच ।।**

**भवान्मायानरो भिक्षुर्नैवास्ति परमेश्वर । हित्वारण्यविहारं भो पावनं कुरु मे पुरम् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) अङ्ग! (अहं) दण्डी वनचरः भिक्षुः अस्मि। (हे) राजन्, इह आनंद+संरम्भात् कस्मात् आगतः असि? किम् (कार्यम्)?'१४. राजा उवाच। '(हे) परमेश्वर, भवान् माया+नरः अस्ति। नैव भिक्षुः। भो, अरण्य+विहारं हित्वा मे पुरं पावनं कुरु।'१५।

श्रीगुरूंनी विचारले, 'अरे राजा, मी तर एक वनवासी, दंडधारी संन्यासी आहे. राजेसाहब, इतक्या आनंदाने आणि समारंभपूर्वक कशासाठी येणे केले? आपले माझ्याकडे काय काम आहे?'१४. राजा म्हणाला, 'भगवंता, आपण मानुष रूप घेतले असले तरी ते आपले खरे स्वरूप नाही. आपण सामान्य संन्यासी तर मुळीच नाहीत. आपण स्वीकारलेला हा वनविहार सोडून माझ्या नगरीत वास करून तिला पावन करावे.' **पुरं** या शब्दाचा दुसरा अर्थ हे मानवी शरीर असाही होतो. याला डोक्यावर सात (डोळे, कान, नाकपुड्या आणि मुख) आणि खाली बेंबीसहित समोरची तीन आणि टाळू अशी अकरा दारे आहेत; दिशा, वायू इत्यादि द्वारपाल आहेत; त्वचा, मांस, रक्त, मेद (चरबी), अस्थी व स्नायू हे प्राकार (दालने) आहेत; मूलाधारापासून आज्ञा पर्यंतची चक्रे ह्या अट्टालिका (galleries) आहेत; रोमरूपी वृक्षांनी त्याचा परिसर बहरलेला आहे; आणि सप्त धातूंनी ते पुरेपूर भरलेले आहे. कठोपनिषदांत (२:२:१) एकादश दारांचे नगर असे म्हटलेलेच आहे. श्रीमद्भगवद्गीतेतही (५:१३) 'नवद्वारे पुरे' असा उल्लेख आहे. हे माझे शरीर मलमूत्रादींनी अपवित्र असले तरी तेच आत्मज्ञानाचे एकमेव साधन असल्याने, आपण ते पावन करावे म्हणजेच आत्मज्ञानाला योग्य करावे, असा त्या राजाच्या प्रार्थनेचा भाव आहे.१५.

**इत्थं श्रुत्वा सकारुण्यमुदारं वाक्यमच्युतः । तथेत्युक्त्वाऽऽययौ प्रेम्णा पुरं पावनपावनः ।।१६।।**
**भेजे छत्रप्रकीर्णै राट् पादचारी सुखासने । उपवेश्य गुरुं विप्र-वाहिते तूर्यनिःस्वनैः ।।१७।।**
**वेदघोषं द्विजाश्चक्रुर्मागधाः स्तोत्रमुत्तमम् । जयघोषं तथाप्यन्य एवं गोपुरमागतः ।।१८।।**
**गुरुः प्रत्यक्पथं पुर्या एत्वाऽश्वत्थे भयङ्करम्। स ब्रह्मराक्षसं शक्रं ददर्शातीन्द्रियः प्रभुः ।।१९।।**
**तद्दर्शनान्नराद्भूत्वा प्रशान्तो ह्यवरुह्य सः । गुरुं नत्वोद्धर हरे कुयोनेर्मेत्युवाच तम् ।।२०।।**

इत्थं सकारुण्यं उदारं वाक्यं श्रुत्वा पावनपावनः अच्युतः 'तथा' इति उक्त्वा पुरं आययौ।१६। राट् (स्वयं) पादचारी गुरुं विप्र+वाहिते सुखासने उपविश्य छत्र+प्रकीर्णैः भेजे।१७। द्विजाः वेदघोषं चक्रुः, मागधाः उत्तमं स्तोत्रं (चक्रुः), तथा अन्ये अपि जयघोषं चक्रुः। एवं गोपुरं आगतः।१८। गुरुः प्रत्यक्+पथं पुर्या एत्वा सः अतीन्द्रियः प्रभुः अश्वत्थे भयङ्करं शक्रं ब्रह्मराक्षसं ददर्श।१९। तत्+दर्शनात् सः प्रशांतः भूत्वा नरात् अवरुह्य गुरुं नत्वा तं उवाच, '(हे) हरे मे कुयोनेः उद्धर', इति।२०।

हे त्याचे काकुळतीचे पण प्रौढ बोलणे ऐकून अग्नी, वायू, सोम, सूर्य, इन्द्र इत्यादि पावन देवतांनाही पावन करणारे अच्युत श्रीगुरु 'ठीक आहे,' असे म्हणून नगराकडे निघाले.१६. स्वतः पायउतार होऊन राजाने श्रीगुरूंना ब्राह्मणांनी वाहिलेल्या पालखीत बसविले आणि त्यांच्यावर छत्र-चामर धरून, मंगलवाद्यांच्या गजरांत नगराकडे आणले.१७. ब्रह्मवृंद वेदमंत्रांचा घोष करीत होते, भाट उत्तम स्तवनांनी स्तुती करीत होते आणि इतरही सगळे श्रीगुरूंचा जयजयकार करीत होते. अशा रीतीने ती मिरवणूक गांवाच्या वेशीजवळ आली.१८. श्रीगुरूंनी पश्चिमेकडील वाटेने नगरांत प्रवेश करतांच त्यांना समोरच्या पिंपळावर एक भयानक आणि घातक ब्रह्मराक्षस दिसला. **अतींद्रिय** या विशेषणाने श्रीगुरूंचे इंद्रियातीत विषयांचे ज्ञान सूचित केले आहे. तसेच **प्रभुः** या विशेषणाने त्यांचे निग्रहानुग्रह सामर्थ्यही सूचित केले आहे.१९. त्या श्रीगुरूंच्या दर्शनाने तो राक्षस एकदम शांत झाला. पिंपळावरून उतरून श्रीगुरूंना नमस्कार करून तो म्हणाला, 'हे हरी, या कुत्सित योनींतून मला मुक्त करा.'२०.

**करस्तन्मूर्ध्नि विन्यस्तो गुरुणाथाभवन्नृवत् । तमाह संगमस्नानाच्छीघ्रं मुक्तो भविष्यसि ।।२१।।**
**इति श्रुत्वा नमस्कृत्य गुरुं स्नात्वा स संगमे । विहाय भौतिकं कायं मुमुचे कर्मबन्धनात् ।।२२।।**
**दृष्ट्वेदं राडभिष्टूय तस्मा आम्रेडितोक्तिभिः । पुरं नीत्वा सुमठिकां निर्मायास्मा उपानयत् ।।२३।।**
**खेदं विनयते स्मेश-पूजारार्तिकगायनैः । घोरं सांसारिकं प्रेम्णा नित्यं तदनुगो नृपः ।।२४।।**

गुरुणा तत्+मूर्ध्नि करं विन्यस्तः। अथ स नृवत् अभवत्। तं (श्रीगुरुः) आह, 'संगम+स्नानात् शीघ्रं मुक्तः भविष्यसि।'२१। इति श्रुत्वा सः गुरुं नत्वा, संगमे स्नात्वा, भौतिकं कायं विहाय कर्म+बंधनात् मुमुचे।२२। इदं दृष्ट्वा राट् तस्मै आम्र+ईडित+उक्तिभिः अभिष्टूय पुरं नीत्वा सुमठिकां निर्माय अस्मै उपानयत्।२३। सः संगमे आह्निकं, ग्रामे भिक्षां, मठे निवसतिं कृत्वा भगवान् भक्त+वात्सल्यात् राण्+निघ्नः अभूत्।२४।

श्रीगुरूंनी त्याच्या मस्तकावर हात ठेवतांच त्याचा देह मानवसदृश झाला. त्याला श्रीगुरू म्हणाले, 'संगमात स्नान केलेस की लगेच तूं मुक्त होशील.'२१. हे श्रीगुरूंचे शब्द कानांवर पडतांच तो त्यांना नमस्कार करून संगमावर गेला. तिथे स्नान करून त्याने पांचभौतिक देहाचा त्याग केला आणि तो कर्मबंधनांतून मुक्त झाला.२२. हा सर्व चमत्कार पाहून राजाने पुनःपुनः स्तुतिवचनांनी त्यांचा गौरव केला आणि त्यांना गाणगापुरांत घेऊन गेला. तिथे त्याने एक सुंदरशी मठी बांधून ती श्रीगुरूंना राहण्यासाठी अर्पण केली.२३. ते श्रीगुरू संन्यासाश्रमाला उचित असे शौच, स्नान, दंडतर्पण, ॐकाराचा जप, भिक्षा, ध्यान इत्यादि आह्निक संगमावर करीत; भिक्षेसाठी गांवांत येत; आणि मठांत निवास करीत. ज्ञानी पुरुषांनीसुद्धां लोकसंग्रहासाठी नित्यकर्माचे अनुष्ठान करावे ह्या सत्संप्रदायाचा धडाच ते स्वतःच्या आचरणांतून घालून देत होते. भक्तवत्सल प्रभू राजाचा भाव पाहून त्याच्या अधीन राहत. त्याच्या इच्छेनुसार वागत.२४.

**आह्निकं संगमे भिक्षां ग्रामे निवसतिं मठे । स कृत्वा भक्तवात्सल्याद्राण्निघ्नो भगवानभूत् ।।२५।।**
**श्रुत्वाऽऽश्रमानर्हचेष्टामस्यामंस्ताल्पधीर्यतिः । भ्रष्टोऽयं दाम्भिक इति तं त्रिविक्रमभारती ।।२६।।**
**तज्ज्ञात्वाशेषहृत्संस्थः सर्वसाक्षी जगत्प्रभुः । भूपं प्राहाद्य गन्तव्यं निन्दकार्दनहेतवे ।।२७।।**
**मन्निन्दकोऽस्ति कुमसी-ग्रामे भिक्षुस्त्रिविक्रमः । इति श्रुत्वा नृपो हृष्टो गमनायोपचक्रमे ।।२८।।**

नृपः ईश+पूजा+आरार्तिक+गायनैः घोरं सांसारिकं खेदं विनयते स्म प्रेम्णा नित्यं तत्+अनुगः (अभूत्)।२५। आश्रम+अनर्ह+चेष्टा श्रुत्वा अल्पधीः त्रिविक्रमभारती यतिः अयं भ्रष्टः दाम्भिकः इति अमंस्त।२६। अशेष+हृत्+संस्थः सर्वसाक्षी जगत्+प्रभुः तत् ज्ञात्वा भूपं प्राह, निंदक+अर्दन+हेतवे गन्तव्यम्।२७। कुमसी+ग्रामे त्रिविक्रमः भिक्षुः मत्+निंदकः अस्ति। इति श्रुत्वा हृष्टः नृपः गमनाय उपचक्रमे।२८।

राजा नित्यनेमाने श्रीगुरूंची पूजा, आरती आणि भजन करून आपल्या घोर प्रापंचिक दुःखांचे उपशमन करू लागला आणि प्रेमभक्तीपूर्वक त्यांचा अनुचर होऊन राहिला. साध्या गायनाच्या श्रवणानेही श्रोता तल्लीन होऊन आपल्या शारीरिक दुःखाचा ठणका कांही काळ तरी विसरतो. मग ईश्वराच्या पूजा, आरती आणि भजनानेही विद्यमान त्रिविध सांसारिक तापांचे शमन होतेच यांत काय आश्चर्य?२५. श्रीगुरूंच्या ह्या संन्यासाश्रमाला अनुचित अशा वर्तनाने जवळच कुमसी गांवात राहणाऱ्या त्रिविक्रमभारती नांवाच्या संन्याशाने, अल्पबुद्धीने श्रीगुरूंविषयी, ‘ हा भ्रष्ट आणि दांभिक संन्यासी आहे,’ असा समज करून घेतला.२६. त्या त्रिविक्रमभारतीच्या मनांतला हा किंतु सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी जगदीशच असलेल्या श्रीगुरूंपासून लपून राहिला नाही. ते राजाला म्हणाले, ‘आपल्याला एका निंदकाला धडा शिकविण्यासाठी जायचे आहे.’२७. ‘कुमसी गांवी त्रिविक्रम नांवाचा संन्यासी माझी निंदा करतो.’ हे ऐकून सद्गुरूंच्या सेवेची संधी मिळाल्याने आनंदित होऊन राजाने जाण्याची सर्व तयारी केली. इथे राजा कदाचित् ‘आपण कशाला कष्ट घेतां? मीच त्या निंदकाला शिक्षा करतो,’ असे म्हणेल यासाठी तो निंदक संन्यासी आहे हे श्रीगुरूंनी स्पष्ट केले आहे. संन्याशाला, तो अपराधी असला तरी, दंड करण्याचा अधिकार राजाला नाही हे सूचित केले आहे.२८.

**सुपालके तूपवेश्य नृपचिह्नैः परिष्कृतम् । श्रीगुरुं कुमसीग्रामं निन्ये राड् यत्र भारती ।।२९।।**
**नृसिंहध्याननिष्ठोऽपि स तदा योगिमायया । सम्भूय चञ्चलमना आजह्वे स्तोतुमीश्वरम् ।।३०।।**
**सुप्रसन्न नृसिंहेश दयाब्धे भक्तभावन । कस्मात्तेऽद्य न सामीप्यं ध्याने स्तोष्ये दयस्व भोः ।।३१।।**
**स्तुत्वैवं स नदीतीरे ध्यानाज्ज्ञात्वा स्थितं विभुम् । त्रस्तचित्तोऽभ्यगाद् द्रष्टुमचिन्त्याव्यक्तविग्रहम् ।।३२।।**
**त्रिविक्रमो जवेनैत्य योगिमायावृतान्तरः । उच्चावचान्यतीन्दृष्ट्वा भूरिशो मोहमाप सः ।।३३।।**

नृपचिह्नैः परिष्कृतं श्रीगुरुं सुपालके तु उपवेश्य राड् कुमसीग्रामे, यत्र भारती, निन्ये।२९। सः नृ+सिंह+ध्यान+निष्ठः अपि तदा योगि+मायया चञ्चल+मना सम्भूय ईश्वरं स्तोतुं आजह्वे।३०। (हे) नृसिंह+ईश, दया+अब्धे भक्त+भावन, अद्य ध्याने कस्मात् ते सामीप्यं न? भोः दयस्व, स्तोष्ये।३१। एवं स्तुत्वा स ध्यानात् विभुं नदीतीरे स्थितं ज्ञात्वा त्रस्त+चित्तः अचिन्त्य+अव्यक्त+विग्रहं द्रष्टुं अभ्यगात्।३२। योगि+माया+आवृत+अंतरः त्रिविक्रमः जवेन एत्य भूरिशः उच्च+अवचान् यतीन् दृष्ट्वा सः मोहं आप।३३।

छत्र-चामरादि राजचिह्नांनी सजविलेल्या श्रीगुरूंना उत्तम पालखीत बसवून राजाने त्यांना कुमसी गांवी त्रिविक्रमाकडे नेले.२९. **नृ** म्हणजे जीव, त्याची **सिं** म्हणजे अविद्या **ह** म्हणजे हरण करणारा जो परमात्मा त्या नृसिंहाचे ध्यान त्रिविक्रम यती करीत असत. त्या वेळी मात्र त्यांच्या ध्यानात नेहमी येणारे नरसिंहाचे रूप योगेश्वर श्रीगुरूंच्या मायेने येईना. अशा रीतीने चलच्चित्त झालेल्या यतीने आपल्या इष्टदेवाचे - नृसिंहाचे स्तवन आरंभिले. 'हे दयासागरा, भक्तपालका नृसिंहदेवा, आज ध्यानांत आपण कां बरे येत नाहीत? देवा, दया करा, मी आपले स्तवन करीत आहे!'३१. अशी स्तुती केल्यानंतर त्या त्रिविक्रमाने ध्यानाने प्रभू नदीकांठी असल्याचे जाणून तो ज्याचे स्वरूप अचिंत्य आणि अव्यक्त आहे अशा भगवंताच्या दर्शनासाठी व्याकुळ मनाने नदीकांठी आला.३२. श्रीगुरूंच्या मायेचा चित्तावर पगडा असलेला त्रिविक्रम धावत धावतच तिथे येऊन पाहतो तर त्याला जिकडे तिकडे लहान-मोठे खूपसे संन्यासीच दिसू लागले. त्या विपरीत दर्शनाने त्याचा विवेक हतबल झाला आणि तो पुरता गोंधळून गेला.३३.

**व्यालोकि परितस्तेन सर्वे संन्यासिरूपिणः । ज्यायांसोऽपि कनीयांसः प्रशान्ता दण्डिनोऽमिताः ।।३४।।**
**आहेशो विस्मितं तं यं धिक्करोष्यस्मि दाम्भिकः । भ्रष्टः स इन्मयोद्भाव्य मायामसि परीक्षितः ।।३५।।**
**नृसिंहचिन्तकोऽसि त्वं यतिधर्मसुशिक्षितः । संन्यासी लोकविज्ञातः संन्यस्तं ब्रूहि किं त्वया ।।३६।।**
**न्यस्तसूत्रशिखो दण्डी रागद्वेषाकुलान्तरः । वेषानुकारी संन्यासी धर्मज्ञो वा भवेदपि ।।३७।।**

ईशः तं विस्मितं आह, 'यं धिक्+करोषि सः दाम्भिकः भ्रष्टः अस्मि। इत् मया मायां उद्भाव्य परीक्षितः असि।'३४। तेन परितः सर्वे ज्यायांसः कनीयांसः अपि प्रशांता अमिताः संन्यासिरूपिणः दण्डिनः व्यालोकि।३५। 'त्वं नृसिंह+चिंतकः यति+धर्म+सुशिक्षितः संन्यासी असि। त्वया किं संन्यस्तं?' ब्रूहि।३६। न्यस्त+सूत्र+शिखः दण्डी वेष+अनुकारी धर्मज्ञः वा राग+द्वेष+आकुल+अंतरः संन्यासी भवेत् अपि?३७।

त्याला आजूबाजूला सगळीकडे लहान-थोर अगणित दंड धारण केलेले प्रशांत संन्यासीच दिसूं लागले!३४. आश्चर्याने स्तिमित झालेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'ज्याचा दांभिक आणि भ्रष्ट संन्यासी म्हणून तूं धिक्कार करतोस तोच मी आहे. मीच माया पसरून तुझी परीक्षा घेत आहे.'३५. 'तू नरसिंहाचे ध्यान करतोस, संन्यासधर्माचे उत्तम शिक्षण घेतले आहेस आणि लोकांत तुझे चांगले नांव आहे! मला सांग, तू कशाचा संन्यास (त्याग) केला आहेस?'३६. 'शेंडी कापून आणि जानवे तोडून, हातांत दंड धरून, केवळ संन्याशाचा वेष धारण केला किंवा संन्यासधर्माचा कोरडा अभ्यास केला तरी, जोवर चित्त राग (आसक्ती) आणि द्वेष यांनी व्यापलेले आहे तोवर कुणी संन्यासी होईल कां?'३७.

**दम्भिलक्षणजिज्ञासुरागतोऽस्म्यद्य कृत्स्नशः । त्वं नृसिंहप्रसादेन विद्वंस्तद्वक्तुमर्हसि ।।३८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**प्रत्याहतमतिस्तेऽस्मि भगवन्नीश मायया । नापि वक्तुं हृषीकेश शक्यः पाहि दयानिधे ।।३९।।**

(अहं) दम्भि+लक्षण+जिज्ञासुः आगतः अस्मि। (हे) विद्वन् त्वं नृसिंहप्रसादेन वक्तुं अर्हसि।'३८। त्रिविक्रम उवाच। '(हे) भगवन्, ईश, (अहं) ते मायया प्रति+आहत+मतिः अस्मि। (हे) हृषीकेश वक्तुं अपि न शक्यः। (हे) दयानिधे, पाहि।३९।

'माझ्या वागण्याचा विचार करतांना तूं 'सर्वाठायी आत्मस्वरूपाचा (आपल्याच स्वरूपाचा) साक्षात्कार झाल्यावर कुणी कुणाला पाहायचे?' ह्या बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) याज्ञवल्क्याने मैत्रेयीला केलेल्या उपदेशानुसार 'आत्मसाक्षात्कारी पुरुष सर्व पाहणे, हुंगणे इत्यादि संवेदनारहित दगडासारखा क्रियाशून्य असतो' एवढेच लक्षांत घेतले. छांदोग्यांत (८:१२:३) इंद्राला प्रजापतीने सांगितले आहे की, 'आत्मज्ञानाच्या उंचीवर पोचलेला उत्तम पुरुष स्त्रियांशी वा यानांशी रमतांना दिसला तरी त्याला देहात्मभाव नसतो.' हे तूं विसरलास! आत्मदर्शनाच्या विषयी सांख्यांनी तो देहापासून वेगळा असल्याचे जाणूनही, वेदांचा सिद्धांत न मानल्याने बुद्धी आणि आत्मा यांच्या भेदज्ञानाशीच ते अडून राहिले; कणादादि वैशेषिक विविध रंगांच्या क्षारांत वस्त्राचा शोध घ्यावा तसे नऊ गुणांनी युक्त (गुणातीत) आत्मतत्त्वाचा मागोवा घेत राहिले; तसेच कर्मिष्ठ पूर्वमीमांसक वेदांचे प्रामाण्य मानूनही बाह्य विषयांतच चित्त हरवून बसले आणि त्यांना आत्मैक्यरूप परमार्थसत्य नाशिवंत भासले; हे सगळे रहाटगाडग्यासारखे फिरतच राहिले. संन्यासी असूनही - शांकर अद्वैत सिद्धांताचा स्वीकार करूनही, तुझी त्यांच्यासारखीच अवस्था झालेली दिसते. तूं मला दाम्भिक म्हणतोस ना? तर दाम्भिकाची काय लक्षणे असतात ते तुझ्याकडून समजून घ्यायला मी आलो आहे.'३८. त्रिविक्रम म्हणाला, 'भगवंता, परमेश्वरा, तुझ्या मायेने माझी बुद्धी कुंठित झाली आहे. सर्व इंद्रियांच्या नियंत्या, मला कांही बोलणेही अशक्य झाले आहे. दयासागरा, माझे रक्षण करा!'३९.

**प्रपन्नोऽस्मि क्षमस्वेश मन्तून्मे ध्यानपुण्यतः । साक्षाद्दृष्टं हि ते धाम नृसिंहोऽसि दयस्व भोः ।।४०।।**
**इति स्तुवति तस्मिन्स भगवान्पूर्वरूपतः । प्रादुरासीत्तथाप्यन्ये सैन्या मन्त्री नृपः स्फुटम् ।।४१।।**
**सैन्यमध्ये स्थितं भूप-वीजितं च त्रिविक्रमः । विश्वरूपं स्वनेत्रेण न शशाकापि वीक्षितुम् ।।४२।।**
**तमाह दुर्निरीक्ष्यं मे रूपं दिव्यदृशापि ते । दर्शितं ध्यानहृष्टेन धामाथो पश्य लौकिकम् ।।४३।।**
**ततः प्रशान्तसंन्यासि-रूपेणावस्थितं हरिम् । दृष्ट्वा प्रकृतिगः प्राह भगवन्तं त्रिविक्रमः ।।४४।।**

प्रपन्नः अस्मि। हे ईश, मे मन्तून् क्षमस्व। ध्यान+पुण्यतः हि ते धाम साक्षात् दृष्टम्। भोः नृसिंहः असि। दयस्व!'४०। इति तस्मिन् स्तुवति भगवान् पूर्व+रूपतः प्रादुरासीत्। तथा अन्ये, सैन्या, मन्त्री, नृपः अपि स्फुटम् (प्रादुरासीत्)।४१। सैन्यमध्ये स्थितं भूप+वीजितं विश्वरूपं त्रिविक्रमः स्वनेत्रेण वीक्षितुं न शशाक।४२। तं (श्रीगुरुः) आह। 'दिव्यदृशा अपि दुर्निरीक्ष्यं मे रूपं ध्यान+हृष्टेन (मया) ते दर्शितम्। अथो लौकिकं धाम पश्य।'४३। ततः प्रशांत+संन्यासि+अवस्थितं हरिं दृष्ट्वा प्रकृतिगः त्रिविक्रमः भगवन्तं प्राह।४४।

हे ईश्वरा! मी तुला शरण आलो आहे. माझे अपराध पोटांत घ्या. ध्यानाभ्यासाच्या पुण्याईने मला आज आपले स्वरूप साक्षात् पहायला मिळाले. आपण प्रत्यक्ष नरसिंहच आहांत! माझ्यावर दया करा.'४०. अशा प्रकारे त्रिविक्रमाची प्रार्थना ऐकून भगवान् श्रीगुरू आपल्या पूर्व रूपाने प्रकट झाले. तसेच सेनेसह राजा आणि मंत्रीगणही स्पष्ट दिसूं लागले.४१. सैन्याच्या मध्यभागी राजाने हातांतील चामर वारा घातलेले, श्रीगुरूंनी प्रकटविलेले विश्वरूप त्रिविक्रमाच्या चर्मचक्षूंना पहावले नाही. ते त्याच्या डोळ्यांत सामावेना.४२. विश्वरूपाने दिपलेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'योगादि सायास करूनही दिव्यदृष्टीलाही पहायला कठीण असे हे माझे विश्वरूप तुझ्या ध्यानाभ्यासाने प्रसन्न होऊन तुला दाखविले आहे. आतां हे लौकिक रूप पाहा.'४३. मग त्रिविक्रमाला प्रशांत संन्यासी रूपांत समोर पालखीत बसलेले पापतापहर श्रीगुरू दिसू लागले. आपल्या सहज अवस्थेत येऊन तो प्रभूंना म्हणाला.४४.

**कायेन मनसा वाचा केवलैरिन्द्रियैरपि । असत्कृतोऽसि विश्वात्मन्मया त्वां क्षामयेऽद्य तत् ।।४५।।**
**धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि कृतकार्योऽस्मि दर्शनात् । रूपं पुराऽर्जुनायेदं दर्शितं मेऽद्य तत्पुनः ।।४६।।**
**हरेऽविद्याप्रवाहे मां मज्जन्तं ज्ञाननौकया । कृपामरुत्संगतया स्वात्मरूपतटं नय ।।४७।।**

(हे) विश्व+आत्मन्, कायेन, मनसा, वाचा, केवलैः इन्द्रियैः अपि वा मया असत्+कृतः असि तत् त्वां अद्य क्षामये।४५। 'दर्शनात् धन्यः अस्मि! अनुगृहीतः अस्मि! कृतकार्यः अस्मि! पुरा इदं रूपं अर्जुनाय दर्शितं तत् अद्य पुनः मे (दर्शितम्)।४६। (हे) हरे, अविद्या+प्रवाहे मज्जन्तं मां ज्ञान+नौकया कृपा+मरुत्+संगतया स्व+आत्म+रूपं तटं नय।४७।

'हे विश्वरूप प्रभो, मी ज्या ज्या कांही शारीरिक (हातवारे करून, बोट दाखवून, तोंड वांकडे करून इत्यादि), मानसिक (आपल्याविषयी कुत्सित भाव धरून), वाचिक (धिक्कारादि उच्चारण) कृतींनी अथवा केवळ इंद्रियांनीसुद्धा आपला अधिक्षेप केला त्यांचा मला पश्चाच्चाप होत आहे. मी त्या सर्व अपराधांसाठी आपल्याजवळ क्षमायाचना करीत आहे.'४५. 'आपण दिलेल्या या दर्शनाने मी धन्य झालो आहे! अनुगृहीत झालो आहे! कृतकृत्य झालो आहे! पूर्वी अर्जुनाला दाखविलेले हे विश्वरूप आज आपण मला दखविले आहे!.४६. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा तीन प्रकारच्या दुःखांचे हरण करणाऱ्या हरी, अविद्यारूप जलप्रवाहांत बुडत असलेल्या मला, आपल्या कृपेच्या वाऱ्याने परोक्ष आत्मज्ञानरूपी नौकेला प्रेरवून, जीवात्मा आणि परमात्मा यांच्या अखंडैकरसरूपाच्या (अपरोक्ष ज्ञानरूपी) पैलतीराला पोचवा.' हा रूपक अलंकार आहे.४७.

**तीर्त्वाऽविद्यानदीं ज्ञान-प्लवेन परमं पदम् । द्राग्यास्यत्रैव तिष्ठेति तमुक्त्वा श्रीगुरुर्ययौ ।।४८।।**

श्रीगुरुः तं, 'ज्ञान+प्लवेन अविद्या+नदीं तीर्त्वा द्राक् यासि। अत्रैव तिष्ठ,' इति उक्त्वा ययौ।४८।

त्रिविक्रमाच्या प्रार्थनेवरून हा परमार्थाच्या उपदेशाला योग्य होऊन आपल्याला शरण आला आहे असे पाहून श्रीगुरूंनी त्याला सांगितले की, *'तत्त्वमसि'* इत्यादि महावाक्यांच्या श्रवणाने आणि भागत्यागलक्षणेने निश्चित केलेले अत्मस्वरूपाचे (परोक्ष) ज्ञान हीच नौका ह्या अविद्यारूपी नदीला पार करण्याचे साधन आहे. श्रवण-मनन-निदिध्यासन यांनी अभानावरणरूप अविद्येचा, आणि चिदन्वयदृष्ट्या - सर्व ठिकाणी चैतन्यच पाहत, अवशिष्ट प्रारब्धाचा भोग भोगून विक्षेपरूप अविद्येचा अपक्षय करावा. असे केल्याने देशादि परिच्छेद आणि त्रिविधभेद (सजातीय, विजातीय आणि स्वगत) यांच्या पलीकडचे योग्यांनाच लाभणारे प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अभिन्न स्वरूप ह्याच जन्मी तूं निश्चित पावशील. (तुला पुन्हां जन्म घ्यावा लागणार नाही असा आशय.) तूं इथेच स्थिर हो. इथे म्हणजे नृसिंहाचे ध्यान आणि तत्त्वज्ञानाचे विवेचन यांतच स्थिर हो म्हणजे मनाची गती थांबव. इथेच म्हणजे आत्मरूपांतच स्थिर हो. देहादि अनात्म विषयांचा विचार सोड. 'मी संन्यासी आहे, शौच, आचार, जप करणे मला आवश्यक आहे. जे संन्यासी असे करीत नाहीत ते निंद्य आहेत. जे अनुष्ठान करतात ते वंद्य आहेत' असा दुराग्रह, 'हे सर्व जगत् ईश्वराने व्यापलेले आहे' (ईशोपनिषत् १) ह्या श्रुतीला स्मरून अजिबात सोडून दे. ईशावास्यांतच (ईशोपनिषत् २, ११) 'कर्मांचे अनुष्ठान करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी', इत्यादि उपदेश असला तरी सर्व एषणांचा त्याग केलेल्या तुझ्यासारख्या अधिकारी पुरुषाला त्याचे अनुष्ठान अनुचित आहे. कारण त्याने चित्तविक्षेप होऊं शकतो, जो ज्ञानाला अडसर ठरतो.' (अर्थात परमेश्वराला विमुख असलेल्या साधनरहित सामान्य जीवांना आपापल्या आश्रमांचे अनुष्ठान केलेच पाहिजे.

**क्षणात्ससैन्यभूपेन साकमेत्य मठं प्रभुः । कर्ममार्गं ततानेशश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ।।४९।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे भीमामरजासंगमनिवासो नाम त्रयोदशोऽध्यायः ।।१३।।**

प्रभुः क्षणात् ससैन्यं भूपेन साकं मठं एत्य लोकसंग्रहं चिकीर्षुः ईशः कर्म+मार्गं ततान।४९।

अन्यथा त्यांना प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो आणि प्रपंच आणि परमार्थ या दोहोंपासून ते भ्रष्ट होतात. हे यांत सुचविलेले आहे.) असा त्याला उपदेश करून श्रीगुरू मठाला परतले.४८. मग प्रभू राजा आणि सर्व सेना यांना घेऊन योगगतीने लगेच मठाला परतले; आणि 'मीच जर आश्रमोचित कर्मांचा त्याग केला तर लोकही तसेच वागूं लागतील (भ.गीता ३:२३-२५) आणि मी अनर्थाला कारण होईन यासाठी मी स्वतः धर्माचे अनुष्ठान करून इतरांकडूनही ते करवून घेईन', अशा लोकसंग्रहाच्या इच्छेने भगवंतांनी कर्ममार्गाचा प्रसार केला.४९.

या अध्यायाबरोबरच द्विसाहस्रीतील ज्ञानकांड पूर्ण होऊन पुढच्या अध्यायापासून पांच अध्यायांत कर्मयोगाची मांडणी केली आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तेरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।।चतुर्दशोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**ज्ञानयोग इयानुक्तः सिद्ध्यै संन्याससत्पथः। कुतो भगवता पश्चात्कर्मयोगः प्रकाशितः ।।१।।**

नामधारक उवाच। 'सिद्ध्यै संन्यास+सत्+पथः इयान् ज्ञानयोगः उक्तः। भगवता पश्चात् कुतो कर्मयोगः प्रकाशितः?१।

**श्रीगणेशाय नमः। तेरा अध्यायांत झाले ज्ञानकांडाचे निरूपण। चित्त शुद्ध जयाचे तो यायोगे तोडी कर्मबंधन।।१।। चित्त जयाचे शुद्ध नसे तयाचे पापकर्म नासून। वैराग्य उदयासाठी पांच अध्यायीं कर्मकांडविवेचन।।२।। चौदाव्या अध्यायीं मत्त ब्राह्मणां वेदसार सांगती। श्रीगुरु त्यापरी अंत्यजाकरवी विप्रगर्व परिहरती।।३।।**

नामधारक विचारीत आहे. 'ना कर्म, ना संतति ना संपत्ती या कशानेच अमृतत्वाची प्राप्ती होत नाही, ती एका त्यागानेच होते;' (कैवल्य उ. ३) 'अंधःकाराच्या पलीकडच्या त्या सूर्यसंकाश महान पुरुषाला जाणल्यानेच मृत्यूला ओलांडतां येते; यापेक्षां अन्य मार्ग नाही;' (श्वेताश्वतर उ. ३:८) 'ब्रह्माला जाणणाराच परमपद पावतो;' (तैत्तिरीय उ. २:१:१) ह्या आणि इतरही अनेक श्रुतिवचनांनी कर्मसंन्यासपूर्वक श्रवणादि साधनांनी ज्ञान झाल्यावरच मोक्षाची प्राप्ती होते असे सांगितले आहे. तसेच कर्माने जीव बांधला जातो, असे संन्यासोपनिषदांत व अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणे संन्यास हाच मोक्षाचा उत्तम मार्ग आहे असा ज्ञानयोगाचाही उपदेश केला. मग आतां भगवंत कर्ममार्गाचे प्रतिपादन कां करीत आहेत?'१.

**अविद्याघातकं कर्म तदुत्थं कथमित्यमुम् । छिन्धि मे संशयग्रन्थिम् भगवच्चरितासिना ।।२।।**

'तत्+उत्थितं कर्म कथं अविद्या+घातकम्? अमुं मे संशय+ग्रन्थिं भगवत्+चरित+असिना छिन्धि।'२।

'नवव्या अध्यायांत (द्वि.सा. ९:७०) श्रीगुरूंनीच शिष्यांना उपदेश करतांना स्वाश्रमाला उचित असे कर्म करावे अन्यथा पतन होते. असा उपदेश शिष्यांना केला आहे. मग अशी शंका कां घेतोस?' असा प्रश्न अपेक्षून नामधारक आपला प्रश्न अधिक स्पष्ट करतात. 'अविद्येपासून अविवेक, अविवेकाने देहादि उपाधींचा अभिमान, अभिमानापासून रागद्वेष आणि त्या रागद्वेषांमुळेच कर्म अशा परंपरेने कर्म हे अविद्येपासून निपजलेले आहे. तिच्यापासूनच उद्भवलेले कर्म अविद्येच्याच घाताला कसे कारण होईल? ही माझ्या मनांत पडलेली संशयाची गाठ आपण भगवच्चरित्ररूपी खड्गाने छेदावी.'२.

नामधारकाच्या प्रश्नाचे उत्तर कर्माचा आणि आत्मज्ञानाचा परस्परसंबंध समजून घेऊनच देतां येईल. याविषयी आरंभीच ब्रह्मसूत्राच्या (३:४:२५) आधारे केवळ ज्ञानानेच मोक्ष होतो, त्याला इतर कोणत्याही साधनाची अपेक्षा नाही हे दृढ करतात. सूत्रांत सांगितल्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या हेतूने सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाला अग्नी वा इंधन (समिधा) यांची उठाठेव करण्याची आवश्यकता नाही. आपल्या ज्ञानोपासनेच्याच बळावर तो आपले आत्मप्राप्तीचे ध्येय गाठूं शकतो. हा सिद्धांत दृढ केल्यावर श्रीस्वामिमहाराज त्याच्याच पुढच्या (३:४:२६) सूत्राधारे ज्ञानाच्या मोक्षप्राप्तीच्या कार्याला अन्य कशाचीही (कर्माची) अपेक्षा नसली तरी त्या ज्ञानाच्या उत्पत्तीला मात्र कर्म नितांत आवश्यक आहे. म्हणजेच कर्म हे ज्ञानाचे कारण आहे. ज्ञान आणि कर्म यांचा असा साध्य-साधन संबंध आहे. ज्ञानोत्पत्तीसाठी कर्मे दोन प्रकारे कारणीभूत होतात. १. संस्कारांनी आणि २. विविदिषा उत्पन्न करून.

**संस्कार -** गौतमसूत्रांत खालील चाळीस संस्कारांचा उल्लेख केलेला आहे.

१. गर्भाधान, २. पुंसवन, ३. सीमन्तोन्नयन, ४. जातकर्म, ५. नामकर्म, ६. अन्नप्राशन, ७. चौल, ८. उपनयन.

## ।। सिद्ध उवाच ।।

**कर्कटीं तद्भवा घ्नन्ति यथा मृत्क्षालनं मृदा । तथाऽविद्या च कर्मापि कर्मणैव विलीयते ।।३।।**

सिद्ध उवाच। 'यथा कर्कटीं तत्+भवा घ्नन्ति, मृदा मृत्+क्षालनं तथा अविद्या च कर्म अपि कर्मणा एव विलीयते।३।

९. प्राजापत्य, १०. सोम्य, ११. आग्नेय, १२. वैश्वदेव ही चार वेदव्रते.

१३. स्नान (सोडमुंज), १४. सहधर्मिणीसंयोग (विवाह).

१५. देवयज्ञ, १६. भूतयज्ञ, १७. पितृयज्ञ, १८. ब्रह्मयज्ञ आणि १९. मनुष्ययज्ञ हे पांच महायज्ञ.

२०. अष्टका, २१. अन्वष्टका, २२. पार्वणश्राद्ध, २३. श्रावणी, २४. आग्रहायणी, २५. चैत्री आणि २६. आश्वयुजी हे सात पाकयज्ञ.

२७. अग्न्याधान, २८. अग्निहोत्र, २९. दर्शपूर्णमास, ३०. आग्रयण, ३१. चातुर्मास्य, ३२. निरूढपशुबंध, ३३. सोत्रामणि हे सात हविर्यज्ञ.

३४. अग्निष्टोम, ३५. अत्यग्निष्टोम, ३६. उक्थ्यः ३७. षोळशी, ३८. वाजपेय, ३९. अतिरात्र, ४०. आप्तोर्याम हे सात सोमयाग.

'ह्या चाळीस संस्कारांनी युक्त ब्राह्मण सायुज्यता आणि सलोकता या मुक्तींचा अधिकारी होतो असे गौतम स्मृतीचे (८ः१४-२४) वचन आहे. कुठे सोळा, कुठे चोवीस तर कुठे अठ्ठेचाळीस संस्कारांचेही वर्णन आहे. ह्या संस्कारांनी संस्कारित झालेल्या पुरुषाचे चित्तच आत्मज्ञानाला योग्य होते.'

**विविदिषा -** बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे वेदाभ्यास, यज्ञ, दान, तप, उपवास यांनी ब्राह्मणाला विविदिषा उत्पन्न होते. ब्रह्मसूत्रकारांनीही आश्रमकर्म विहितच असल्याने ते केले पाहिजे (३:४:३२) असे म्हणत याचीच पुष्टी केली आहे. स्कंपुराणान्तर्गत सूतसंहितेत (यज्ञवैभव खंड २:६८-६९) असे म्हटले आहे की

महापापी लोकांना ज्ञानयज्ञाविषयी रुची तर नसतेच, उलट ते त्याचा तिरस्कारच करतात. ज्ञानाला प्रतिबंध करणारी पापे, विहित कर्मे परमेश्वरार्पण बुद्धीने केल्याने नाश पावतात. अशा रीतीने चित्तशुद्धी झाल्यानंतर श्रवणादिकांची गोडी लागते. हीच जिज्ञासा किंवा विविदिषा! वार्तिकसाराच्या (३) वचनानुसार कर्मयोगाचा अज्ञानाशी प्रत्यक्ष विरोध नसला तरी आत्मज्ञानाविषयी आवड निर्माण करून तो मोक्षाला साह्यभूत होतो. अविद्येच्या नाशाला ज्ञानच आवश्यक आहे. ज्ञानाच्या उत्पत्तीसाठी शम-दमादि संपत्तीच पाहिजे. अशा रीतीने प्रत्यक्ष नाही तरी परंपरेने कर्मयोगाचे अनुष्ठान मोक्षोपकारक ठरते. (*'रुचिद्वारोपकुर्वन्ति कर्माण्यात्मविमुक्तये। अज्ञानस्याविरोधित्वान्न साक्षादात्मबोधवत्। अविद्याया न चोच्छित्तौ ज्ञानादन्यदपेक्षते। ज्ञानोत्पत्तौ तु नैवान्यच्छमादिभ्यो ह्यपेक्षते। शमाद्युत्पत्तये नान्यद्बुद्धिशुद्धेरपेक्षते। बुद्धिशुद्धौ च नित्यादिकर्मभ्यो नान्यदिष्यते। पारम्पर्येण कर्मैवं ज्ञानायैवोपयुज्यते।।*)

कर्म हे अशा रीतीने साधन आहे ज्याचे साध्य ब्रह्मात्मज्ञान आहे असा ज्ञानकांड आणि कर्मकांड यांचा साध्यसाधनसंबंध विशद करण्यासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. गर्भाशयांत असलेली खेकडीची पिले आपल्या पायाच्या तीक्ष्ण टोकांनी आपल्याच मातेचे मृदुतर असे पोट फाडून बाहेर येतात. यावरून ज्याच्यापासून उत्पत्ती झाली त्याला तो मारीत नाही असा काही नियम नाही. जे ज्याच्या विरुद्ध ते त्याला घातकही असते. जशी भांड्याला चिकटलेली माती काढायलाही मातीचाच उपयोग होतो ना? त्याचप्रमाणे अविद्या आणि तिच्यापासून निर्माण झालेले, वरचेवर जन्माला घालणारे कर्म, दोन्हीही, माणसाने ईश्वरोपासना म्हणून, फलाची इच्छा न धरतां केलेल्या योग नावाच्या कर्माने नाश पावतात. अशा प्रकारे निष्काम कर्मयोगाचे आचरण न करणाऱ्यांना मात्र प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो; (कृ.यजुः तैत्तिरीय संहिता १:५:२) मग ज्ञानाची तर वार्ताच नको! भगवद्गीतेतही यासाठीच कर्मयोगाचा पुरस्कार केला आहे. *'तस्माद्योगाय युज्यस्व', 'योगः कर्मसु कौशलम्।। २:५०।।'*, (म्हणून तू योगाचाच अभ्यास कर; तोच कर्मबंधनांतून सुटण्याचा उपाय आहे.) *'कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्त्वा पदं गच्छन्त्यनामयम्।।२:५१।।*.३.

**साधनावधि तत्कार्य-मुपात्तपरसाधनः । ततः संन्यस्य शमवान्भवेन्नैष्कर्म्यसिद्धिभाक् ।।४।।**
**प्रकृत्युत्थगुणैः कोऽपि जात्वकर्मा न तत्फले । सक्तोऽज्ञोऽसक्त इद्विद्वानस्येदं लोकसंग्रहे ।।५।।**

'तत् साधनावधि कार्यम्। उपात्त+पर+साधनः ततः संन्यस्य शमवान् नैष्कर्म्य+सिद्धि+भाक् भवेत्।४। 'कः अपि जातुं प्रकृति+उत्थ+गुणैः अकर्मा न। तत् फले अज्ञः सक्तः, ज्ञः विद्वान् असक्तः। अस्य इदं लोकसंग्रहे।'५।

(ज्ञानी पुरुष समबुद्धीने कर्मांच्या फलाचा त्याग करून जन्मबंधांपासून सुटून निर्विकार अशा परमपदाची प्राप्ती करून घेतात.)

**ज्ञानाची साधने अंगी बाणेपर्यंत कर्म करावे -** 'मागच्या अध्यायांतील टीकेत उद्धृत केलेल्या ईशोपनिषद्वाक्यानुसार (२) कर्म करीतच शंभर वर्षे जगण्याचा श्रुतीचा आदेश आहे. तशाच जिवंत असेपर्यंत अग्निहोत्र करावे अशा आशयाच्या श्रुती आहेत. मग आयुष्य सगळे कर्मानेच व्यापून गेल्यावर संन्यास घेऊन श्रवण करावे' या आदेशाचे अनुसरण करता येणार नाही. मग ज्ञान कसे होणार व मोक्षही कसा मिळणार? ह्या आशंकेच्या समाधानासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. ते - कर्माचे निष्काम अनुष्ठान, शम, दम, तितिक्षा, श्रद्धा समाधान आणि उपरती ही ज्ञानाची प्रत्यक्ष साधने प्राप्त होईपर्यंत करीत राहावे. शमदमादि संपत्तीची जोड झाली की संन्यास घेऊन गीतेत सांगितलेल्या 'नैष्कर्म्यसिद्धी'ची प्राप्ती करून घ्यावी. (*'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति'।।१८:४९।।* इथे शमवान् ह्या शब्दाचा उपयोग, 'परसाधनांच्या प्राप्तीनंतर जसा कर्मत्याग केला तसा पुन्हां ज्ञानप्राप्तीनंतर शमदमादिक साधनांचा त्यागही करायचा का' या शंकेचे निरसन करण्यासाठी केला आहे. गीतेचेही असेच प्रतिपादन आहे. *'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते। योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते'।।६:३।।* शमदमादि ज्ञानसाधने जोवर अंगी बाणत नाहीत तोवर संन्यास हा पतनाचेच कारण होतो. 'कर्मही सोडले आणि ब्रह्मज्ञानही गंवसले नाही' असा हा उभयभ्रष्ट, अंत्यजाप्रमाणे त्याज्य आहे असे गरुडपुराणाचे (प्रेतखंड-धर्मकांडः ४९:६४) मत आहे. शमदमादि दैवी संपत्ती ज्याने कमावली त्याने कधीही - ब्रह्मचर्याश्रमांतून, गृहस्थाश्रमांतून वा वानप्रस्थाश्रमांतून संन्यास घ्यायला हरकत

नाही.

**अहं यथानुतिष्ठामि लोकस्तदनुगो भवेत् । नेदं साध्विति मत्वाऽजः कर्मयोगं जगौ प्रभुः ।।६।।**
**कर्मयोगमयं तस्य चेष्टितं शृणु सादरम् । यच्छ्रुत्वा भवसम्बन्धं छित्वा याति परं पदम् ।।७।।**

'यथा अहं अनुतिष्ठामि लोकः तत्+अनुगः भवेत्। इदं न साधु।' इति मत्वा अजः प्रभुः कर्मयोगं जगौ।६। तस्य कर्म+योग+मयं चेष्टितं सादरं शृणु, यत् श्रुत्वा भव+सम्बन्धं छित्वा परं पदं याति।७।

(*'यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्'*, जाबाल उ. ४). अन्यथा आजन्म निष्काम कर्मयोगाचे आचरण करावे. अशा प्रकारे पूर्वापर श्रुतींचा समन्वय होतो.४. कुणीही कसल्याही अवस्थेत अकर्मा होऊ शकत नाही; कारण तो प्रकृतीच्या गुणांनी विवश असतो. पण ज्ञानी पुरुषही कर्म करतांना दिसतात. त्या दोघांत काय भेद आहे? अज्ञ जन कर्माच्या फलाच्या आसक्तीने प्रेरित होऊन कर्म करतात; तर आत्मज्ञानी पुरुष फळाविषयी अनासक्त असतात. यावर असा आक्षेप येऊ शकतो की प्रयोजनाशिवाय अगदी मूर्ख प्राणीसुद्धा प्रवृत्त होत नाही. मग ज्ञानी पुरुष फलाच्या आसक्तीविना कसा कर्म करतो? या प्रश्नाचे उत्तर असे आहे की आत्मज्ञानी (विद्वान्) लोकसंग्रहासाठी कर्म आचरून दाखवितो.५.

'ज्ञान्यांचा विचार ठीक आहे, पण मग श्रीगुरूंना तसे करायची काय आवश्यकता?' तेच सांगतात, 'मी जसा आचार करीन त्याचेच अनुकरण लोक करतील. संन्यासधर्माला प्रतिकूल वर्तन - राजच्या भक्तीसाठी पालखीत बसणे इत्यादि केले तर इतरही लोक आपापल्या आश्रमाला निषिद्ध असे वागतील. असा संकर होणे हे कांही बरे नाही,' ह्या विचाराने श्रीगुरूंनी कर्मयोगाचा उपदेश केला आहे.६. त्या श्रीगुरूंची कर्मयोगाचा उजागर करणारी लीला श्रद्धापूर्वक ऐक; ही ऐकणारे संसाराचा संबंध छेदून परमपदाला पावतात.७.

**ब्रह्मध्रुग्यवनो राजा कश्चिद्विंस्रोऽभवत्खलः । सदस्याहूय विप्रान्स स्वाग्रे वेदानपाठयत् ।।८।।**
**वेदान्पठन्ति ये सार्थास्तेभ्यो दास्ये धनं बहु । इत्याकर्ण्य तदुक्तं ये रैलुब्धास्ते तथाऽभजन् ।।९।।**
**श्रुत्वा खलोऽपि वेदार्थं द्विजाग्रे ब्राह्मणान्छ्रुतीः । अकुत्सयद्गवाशेन मिथ्याचारो मतोऽखिलः ।।१०।।**
**एवं सत्येकदा विप्रौ वैदिकावेत्य दुर्विधौ । मत्तौ तमूचतू राजन् वेदशास्त्रविदौ स्व इत् ।।११।।**

कश्चित् ब्रह्म+ध्रुक् खलः यवनः राजा अभवत्। सः विप्रान् सदसि आहूय स्व+अग्रे वेदान् अपाठयत्।८। ये वेदान् सार्थान् पठन्ति तेभ्यः बहु धनं दास्ये। इति आकर्ण्य ये रै+लुब्धाः ते तथा अभजन्।९। खलः अपि वेद+अर्थं श्रुत्वा, द्विज+अग्रे ब्राह्मणान्, श्रुतीः अकुत्सयत्। गवाशेन अखिलः मिथ्या+आचारः मतः।१०। एवं सति एकदां दुर्विधौ मत्तौ, वैदिकौ विप्रौ तम् एत्य ऊचतू, '(हे) राजन्, (आवां) वेद+शास्त्र+विदौ स्वः इत्।'११।

कुणी एक ब्राह्मणद्वेष्टा दुष्ट यवन जातीचा राजा त्या वेळी राज्य करीत होता. तो ब्राह्मणांना आपल्या दरबारात बोलावून आपल्यासमोर त्यांच्याकडून वेदांचे पठण करवीत असे.८. जे त्याच्यापुढे वेदांचे पठण करून अर्थही सांगत त्यांना तो भरपूर दक्षिणा देत असे. ही वार्ता ऐकून धनाचे लोभी असलेले ब्राह्मण त्याच्याकडे येत आणि वेदांचे सार्थ पठण करीत.९. तो दुष्टही वेदांचे अर्थ ऐकून, ब्राह्मणांपुढे सर्व वेदांची आणि यज्ञाचा शेष म्हणून मांस खाणाऱ्या ब्राह्मणांचीही निंदा करीत असे. सर्व मानवांचे देह मुखादि अवयवांनी सारखेच असतांना वर्णाश्रमाचे प्रतिपादन करणारा, दगडां-लाकडांसारख्या जड वस्तूंत, मूर्तीत आणि चित्रांत तसेच पिंपळादि झाडांतही दैवतांची कल्पना करणाऱ्या वैदिक धर्माच्या समग्र आचाराला तो गोभक्षक मिथ्या ठरवीत असे.१०. असा त्या राजाचा क्रम चालू असतां दोन आचारहीन आणि विद्येच्या मदाने उन्मत्त झालेले ब्राह्मण त्याच्याकडे आले आणि त्याला म्हणाले, 'राजेसाहेब! आम्ही चारही वेद आणि सहा शास्त्रांचे अध्ययन केलेले आहोत.११.

**अस्मत्तुल्यौ न कौ क्वापि त्वन्निघ्नाश्चेदिहानय । श्रुत्वेदं स्वाश्रितेभ्यो राट् शशंसोचुः खलं हि ते ।।१२।।**
**न यान्ति संमुखे केऽपि तयोस्तत्तौ समर्चय । राजाप्यानर्च तौ विप्रौ गजावारोह्य भूषितौ ।।१३।।**
**जैह्व्यौपस्थ्यसुखासक्ति-निदानेनेदृशी स्थितिः । वेदज्ञानामधःपात-शङ्कावर्जितचेतसाम् ।।१४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**विद्यापरिश्रमो वादं विना न सफलोऽस्ति नौ । तदाज्ञापय गच्छावो गां जेतुं विदुषो द्विजान् ।।१५।।**

कौ क्व अपि अस्मत्+तुल्यौ न । त्वत्+निघ्नाः चेत् इह आनय। इदं श्रुत्वा राट् स्व+आश्रितेभ्यः शशंस। ते हि खलं ऊचुः।१२। के अपि तयोः संमुखे न यान्ति। तत् तौ समर्चय। राजा अपि तौ विप्रौ गजौ आरुह्य भूषितौ आनर्च।१३। जैह्व्य+औपस्थ्य+सुख+आसक्ति+निदानेन अधःपात+शंका+वर्जित+चेतसां ईदृशी स्थितिः।१४। विप्रौ उचतुः। 'नौ विद्या+परिश्रमः वादं विना न सफलः। तत् विदुषः द्विजान् जेतुं गां गच्छावः। आज्ञापय।'१५।

'संपूर्ण भूमंडलावर आमच्यासारखे विद्वान् ब्राह्मण कुठेच नाहीत. तुझ्या पदरी असतील तर त्याना आमच्यासमोर वादासाठी आण!' ही त्यांची प्रौढी ऐकून राजाने आपल्या दरबारांतील ब्राह्मणांना विचारले. ते त्या दुष्टाला म्हणाले.१२. 'त्यांच्यासमोर कुणीही वादाला उभेही राहणार नाहीत. तेव्हां त्यांचाच आपण सत्कार करावा.' राजाने त्याप्रमाणे त्या ब्राह्मणद्वयांचा हत्तीवर बसवून, वस्त्रे भूषणे देऊन आदरसत्कार केला.१३.

रसना आणि लिंग यांच्या सुखांच्या आसक्तीने धनाच्याच मागे लागून वेदविक्रयादि दुष्कर्मे करतांना, वेदांचे अध्ययन करूनही, अधःपाताची शंकाही ज्याच्या मनाला शिवत नाही; 'काय तो हाच लोक आहे, परलोक म्हणून कांही नाहीच' असे मानणाऱ्या नास्तिकांची अशी स्थिती होते. यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाप्रमाणे (कठ उ. १:२:६) ते पुनः पुन्हां मृत्यूलाच वश होत राहतात. १४. ते ब्राह्मण राजाला म्हणाले, 'आम्ही कष्टाने संपादन केलेल्या वेदविद्येचे साफल्य वादाविना होणार नाही. तरी सर्व पृथ्वीवर पर्यटण करून विद्वान ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हाला आज्ञा द्या.'१५.

स तथाप्यादिशद्विप्र-पराभवपरो नृपः । जयपत्रं द्विजान्जित्वा गृह्णन्तौ चेरतुर्भुवम् ।।१६।।
वावदूकतया मिथ्या द्विजांस्तर्जयतोः सदा । विवादं त्याजितैः प्राज्ञैर्जयोऽभूद्विशदस्तयोः ।।१७।।
त्रिविक्रमं त्रयीज्ञं तौ श्रुत्वागत्योचतुः कुरु । चेद्वेदज्ञोऽसि वादं नौ देहि वा जयपत्रमित् ।।१८।।

।। त्रिविक्रम उवाच ।।

वेदज्ञास्त्वादृशाः पूज्या द्विजौ नाहं तथाविधः । यतौ जयाजयसमे जिते किं वां भवेदिह ।।१९।।

सः विप्र+पराभव+परः नृपः तथा आदिशत्। द्विजान् जित्वा जयपत्रं गृहणन्तौ भुवं चेरतुः।१६। प्राज्ञैः सदा विवादं त्याजितैः मिथ्या वावदूकतया द्विजान् तर्जयतोः, तयोः विशदः जयः अभूत्।१७। त्रिविक्रमं त्रयीज्ञं श्रुत्वा तौ (तं) आगत्य ऊचुः। 'चेत् वेदज्ञः असि वादं कुरु जयपत्रं इत् वा नौ देही।'१८। त्रिविक्रम उवाच। '(हे) द्विजौ, त्वादृशाः वेदज्ञाः पूज्याः। अहं न तथाविधः। जय+अजय+समे यतौ जिते वां इह किं भवेत्?'१९।

विप्रांचा पराभव करून वैदिक धर्माचा अधिक्षेप करण्यासाठी उत्सुक असलेल्या त्या राजाने त्या ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणे आज्ञापत्र दिले. तेही ब्राह्मणांशी वादविवाद करून त्यांना जिंकून जयपत्र घेत भूमीवर संचार करू लागले.१६. खरे विद्वान् कधीही वादविवाद करीत नसल्याने, वितंडवादाने आणि लटक्या युक्तिवादाने इतर ब्राह्मणांचा अधिक्षेप करण्याने त्या दोघांचा जिकडेतिकडे विजय होऊ लागला.१७. त्रिविक्रम यति हे तीनही वेदांचे जाणते आहेत अशी त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्याकडे जाऊन त्यांनी त्यांना वादाचे आह्वान दिले. म्हणाले, 'आमच्याशी वाद कर अथवा आम्हांला जयपत्र तरी दे!'१८. त्रिविक्रम म्हणाले, 'ब्राह्मण हो! आपल्यासारखे वेदांचे ज्ञानी सन्माननीय आहेत. मी त्यापैकी नाही.' इथे त्या ब्राह्मणांना **वेदज्ञ** असे संबोधन उपहासगर्भ आहे. मनुस्मृतीच्या वचनानुसार (६:८२) अध्यात्माच्या ज्ञानावांचून वेदांचे तत्त्व जाणतां येत नाही किंवा वैदिक कर्मांचे इष्ट फलही प्राप्त होत नाही. अध्यात्माचा गंधही नसणारे हे ब्राह्मण वेदज्ञ होऊंच शकत नाहीत. पुढे त्रिविक्रम भारती त्या ब्राह्मणांना म्हणाले, 'आम्हां संन्याशांना जय आणि पराजय दोन्ही सारखेच. तेव्हां अशा संन्याशाकडून जयपत्र घेण्यांत तुम्हांला काय हशील?'१९.

**पश्येमान्यमितानि त्वं पत्रं देहीति भाषितः । ताभ्यां दास्ये गुरोरग्र इत्युक्त्वा श्रीगुरुं ययौ ।।२०।।**
**तौ मत्तौ स्वासनारूढौ मूढौ तमनुजग्मतुः । मठे श्रीगुरुमासाद्य तमस्तौषीत् त्रिविक्रमः ।।२१।।**
**नम ॐकाररूपाय निर्गुणाय गुणात्मने । जगद्गुरो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत ।।२२।।**
**नाज्ञानान्धः परं वेत्ति यं घूक इव भास्करम् । स त्वं भो मत्तविप्रद्विड्-द्विजौ शासितुमर्हसि ।।२३।।**

'पश्य, इमानि अमितानि (जयपत्रानि), त्वं पत्रं देहि', इति भाषितः (त्रिविक्रमः), 'ताभ्यां गुरोः अग्रे दास्यामि', इति उक्त्वा श्रीगुरुं ययौ।२०। तौ मत्तौ स्व+आसन+आरूढौ मूढौ तं अनुजग्मतुः। त्रिविक्रमः मठे श्रीगुरुं आसाद्य तं अस्तौषीत्।२१। 'नम ॐकार+रूपाय निर्गुणाय गुणात्मने, पर+आनन्द+मूर्ते नमः। हे जगद्गुरो, अच्युत, जय, जय।२२। यं परं अज्ञान+अंधः, घूक इव भास्करं न वेत्ति, सः त्वं भो मत्त+विप्र+द्विट्+द्विजौ शासितुं अर्हसि।'२३।

'ही पहा असंख्य जयपत्रे आम्ही मिळवली आहेत; तूं पण तसेच पत्र लिहून दे!', असा त्यांचा आग्रह पाहून, 'बरे तर, गुरूंच्या समोर देतो', असे बोलून त्रिविक्रम त्यांना घेऊन गाणगापूरला श्रीगुरूंच्याकडे गेला.२०. ते मदांध ब्राह्मण आपापल्या पालख्यांत बसून त्रिविक्रमाच्या मागे गेले. ह्या अशिष्ट वर्तनांतून त्यांनी आपले मूर्खत्वच प्रकट केले. त्रिविक्रमाने गाणगापूरच्या मठांत येऊन श्रीगुरूंना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. २१. 'भगवंता, मायेच्या तीन गुणांनी नटलेल्या या प्रपंचाचा आपल्याशी कांही एक संबंध नाही; आपण आपल्या स्वाभाविक आनंदांतच निमग्न आहांत; द्वैत वा अद्वैत या दोन्हींच्या पलीकडे आपण आहांत; काल, देश आणि वस्तू यांनी परिच्छिन्न नाहीत; स्वगत, सजातीय आणि विजातीय हे भेदही आपल्यांत नाहीत; निन्दा आणि स्तुती आपल्याला सारखीच आहेत; शत्रू आणि मित्र यांना एकरूपच आहांत; आपल्या सर्व इंद्रियांतून प्रसन्नता ओसंडते आहे; मुखावर स्मितहास्य विलसत आहे; निश्चिंत आणि कृतार्थ असे आपण सच्चिदानंदब्रह्मांत स्थिरावलेले आहांत; म्हणजेच आपण ॐकारस्वरूप आहांत. आपल्याला नमस्कार असो!'२२.

**स्तुत्वैवमादितः सर्वं शशंसागमकारणम् । तौ प्राह गुरुरप्याप्तौ साध्यमेतेन किं द्विजौ ।।२४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**राज्ञाज्ञप्तौ द्विजान्जेतुमावां विद्वत्तमौ भुवि । अत्रानीतावनेनोभौ भिक्षू किं वेदपारगौ ।।२५।।**

एवं स्तुत्वा सर्वं आगम+कारणं आदितः शशंस। गुरुः अपि तौ आप्तौ प्राह, 'द्विजौ, एतेन किं साध्यम्?'२४। विप्रौ ऊचतुः, 'राज्ञा आवां भुवि विद्वत्+तमौ द्विजान् जेतुं आज्ञप्तौ। अनेन (त्रिविक्रमेण) उभौ अत्र आनीतौ। (युवां) भिक्षू वेद+पारगौ किम्?' २५।

'तर तूं सगुणाला वंदन करतोस कां?' हा प्रश्न अपेक्षून निर्गुणाला नमस्कार केला आहे. 'मग असा निर्गुण मी शब्दाना कसा गंवसेन?' या प्रश्नाच्या उत्तरी, 'भक्तांवर कृपा करण्यासाठी सगुणरूप धारण केलेल्या आपणांस नमस्कार असो. या अवतारविग्रहांतही आपले सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व आणि सर्वशक्तित्व अस्खलित आहे म्हणून हे अच्युता, सर्व जगाच्या गुरो, निरुपाधिक, निरतिशय आनंद हीच आपली मूर्ती आहे; आमच्या मूर्तीसारखी प्रारब्धकर्मापासून झालेली नाही. भक्तांची मायेच्या आवरणशक्तीपासून सुटका करून विजयी हो, विजयी हो!' एवढे श्रीगुरूंचे सामर्थ्य आहे हे **अच्युत** या संबोधनांतून सूचित केले आहे. 'एवढा मी महान् असूनही लोक मला कसे ओळखत नाहीत?' हा प्रश्न अपेक्षून त्रिविक्रम सांगतात, अज्ञानाने आंधळे झालेले लोक, दिवांधाने सूर्याला पाहूं नये तसे परम ज्योतिस्वरूप ज्ञानप्रदीप आपणांस जाणत नाहीत.'. यावर श्रीगुरूंनी 'तें असूं दे आत्तां तुझ्या येण्याचे काय प्रयोजन आहे?' असे विचारल्यावर त्रिविक्रम म्हणतात, 'हे विद्येच्या मदाने मस्त होऊन गावोगांव ब्राह्मणांचा अधिक्षेप करणारे - त्यांचा द्वेष करणारे, दोघे ब्राह्मण आले आहेत. त्यांना आपणच शासन करूं शकतां.'२३. अशा प्रकारे स्तुती करून त्रिविक्रमाने आपल्या येण्याचे कारण सविस्तर निवेदन केले. तेव्हां श्रीगुरू त्या तिथे आलेल्या दोघा ब्राह्मणांना म्हणाले, 'ह्या व्यर्थ ब्रह्मद्वेषाने तुम्ही काय साधणार आहांत?'२४. ते ब्राह्मण म्हणाले, 'आम्ही सर्वश्रेष्ठ विद्वान् असून पृथ्वीवरील सर्व ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हांला राजाने आज्ञा केली आहे. ह्या त्रिविक्रमाला आम्ही जयपत्र मागितले असतां तो आम्हांला इथे घेऊन आला आहे. तुम्ही दोघे संन्यासी काय वेद जाणाल?'२५.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गर्वेणैव प्रणष्टाः स्यू राक्षसा असुरा द्विजौ । अनादीन्कृत्स्नशोऽनन्तान्कोऽपि वेदान्न वेद रे ।।२६।।**
**ब्रह्मचर्याश्रमे वेदान्पठितुं प्राक्तपोऽतपत् । भरद्वाजो विधिः प्रीतस्तस्मै वेदानदर्शयत् ।।२७।।**
**दृष्ट्वा भास्वद्वेदराशीन् शङ्कितोऽभूदृषिर्ददौ । त्रीन्मुष्टीनृषयेऽद्यापि पठ्यमानो न पारगः ।।२८।।**

श्रीगुरुः उवाच। (हे) द्विजौ, असुरा, राक्षसा गर्वेण एव प्रणष्टा स्यू। अनादीन् अनन्तान् वेदान् कृत्स्नशः कः अपि न वेद, रे!२६। प्राक् भरद्वाजः ब्रह्मचर्य+आश्रमे वेदान् पठितुं तपः अतपत्। प्रीतः विधिः तस्मै वेदान् अदर्शयत्।२७। भास्वत् वेदराशीन् दृष्ट्वा ऋषिः शंकितः अभूत्। (ब्रह्मा) ऋषये त्रीन् मुष्टीन् ददौ। (सः) अद्य अपि पठ्यमानः, न पारगः।२८।

श्रीगुरूंनी त्या ब्राह्मणांची गर्वोक्ति ऐकून त्यांना समजाविले की, 'अरे ब्राह्मणांनो, बली, बाण इत्यादि असुर तसेच रावणादि राक्षस हे गर्वानेच नष्ट झाले! अपौरुषेय - म्हणजे कुणाही व्यक्तीने न रचलेले म्हणून अनादि असलेले आणि अनंत असलेले वेद पूर्णतः कुणीच जाणले नाहीत.' इथे कुणी बृहस्पतींच्या वचनानुसार वेदांचे कर्ते सगळे मुनि, भाण्ड, निशाचर होते (सर्वदर्शनसंग्रह - चार्वाकदर्शनपरिचय) असे म्हणतील तर ते मत शास्त्रविरुद्ध आहे. बृहदारण्यक उपनिषदानुसार (२:४:१०) ऋक्, साम, यजुः व अथर्व वेद हे परब्रह्माची निःश्वसिते (उछ्वास) आहेत. कृ. यजुर्वेदांत (३:८:११:४) वेद अनंत असल्याचे प्रतिपादन आहे.२६. पूर्वी भरद्वाज ऋषींनी वेद शिकण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमांत तप केले. ब्रह्मदेवांनी प्रसन्न होऊन त्यांना सर्व वेदांचे दर्शन घडविले.२७. वेदांच्या त्या तेजस्वी पर्वतप्राय राशींकडे पाहून भरद्वाजाच्या मनांत 'आपल्याकडून इतके सर्व वेदांचे अध्ययन कसे पार पडेल?' अशी शंका आली. तेव्हां ब्रह्मदेवांनी त्याला त्या वेदांच्या राशींतील आपल्या हाताने केवळ तीन मुठी काढून पुस्तकरूपाने दिल्या. आजवर भरद्वाज मुनि त्यांचे पठण करीत आहेत; पण त्यांचाही अभ्यास पूर्ण झालेला नाही.२८.

**पैलो वैशम्पायनश्च जैमिनिश्च सुमन्तुकः । ऋग्यजुःसामाथर्वाख्या अशिक्षन्त श्रुतीः क्रमात् ।।२९।।**
**गुरुर्व्यासो हरिः साक्षात्ततोऽत्र प्रसृता श्रुतिः । पठिताः कतिचिद्वेदा आयुष्मद्भिर्युगान्तरे ।।३०।।**
**शाखयैवाल्पायुषोऽत्र मन्दा वेदज्ञमानिनः । प्रतिग्रहपरान्नस्त्री-सक्ताः सिद्धिविवर्जिताः ।।३१।।**
**व्यासेनोक्ताश्चतुर्वेदाः शाखाङ्गोपाङ्गसंयुताः । आयुर्वेदस्ततो रुग्हृदृग्वेदस्योपवेद उत् ।।३२।।**
**स्वर्णोऽत्रिगोत्रजो गायत्रच्छन्दो ब्राह्मदैवतः । द्व्यरत्निमात्रो दीर्घाक्ष ऋग्वेदो व्यक्तकन्धरः ।।३३।।**

पैलः, वैशयम्पायनः च जैमिनिः च सुमन्तुकः क्रमात् ऋक्+यजुः+साम+अथर्व+आख्या श्रुतीः अशिक्षन्तः।२९। गुरुः व्यासः साक्षात् हरिः। ततः अत्र श्रुतिः प्रसृता। युगान्तरे आयुः+मत्+भिः कतिचित् वेदाः पठिताः।३०। 'अत्र मन्दा अल्पायुषः शाखया एव वेदज्ञमानिनः प्रतिग्रह+पर+अन्न+स्त्री+सक्ताः सिद्धि+विवर्जिताः।'३१। व्यासेन शाखा+अङ्ग+उपाङ्ग+संयुताः चतुः वेदाः उक्ताः। रुक्+हृत् आयुर्वेदः ऋग्वेदस्य उत् उपवेद ततः ।३२। ऋग्वेदः सु+अर्णः अत्रि+गोत्रजः, गायत्र+छन्दः, ब्राह्म+दैवतः, द्वि+अरत्नि+मात्रः, दीर्घाक्षः, व्यक्त+कंधरः।३३।

पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमन्तु ह्या चार शिष्यांनी अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद ह्या चार श्रुतींचे शिक्षण घेतले.२९. त्यांचे गुरू व्यासमुनि हे साक्षात् विष्णूचा अवतार होते. ह्या काळांत (कलियुगांत) त्यांच्यापासूनच वेदांचा प्रसार झाला. कृतादि पूर्वीच्या युगी दीर्घयुषी मुनींनी कांही कांही वेदांचे अध्ययन केले.३०. 'ह्या कलियुगांत मात्र अल्पायुषी, अल्पबुद्धी ब्राह्मण एखाद्या शाखेच्या अध्ययनानेच स्वतःला वेदज्ञ मानतात. तसेच प्रतिग्रह (दान घेणे) परान्न आणि परस्त्री यांच्या ठिकाणी आसक्त असतात. त्यामुळे ते वेदमंत्रांच्या सिद्धीपासून वंचितच राहतात.'३१. आश्वलायनादि शाखा, शिक्षा, कल्प, छंद, व्याकरण, निरुक्त आणि ज्योतिष ही अंगे तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा आणि वेदांत ही उपांगे यांच्यासहित व्यासांनी चार वेदांचे निरूपण केले आहे.

**ऋग्वेद -** त्यांत पहिला ऋग्वेद. रोगनाशक आयुर्वेद हा त्याचा उत्कृष्ट उपवेद विस्तारलेला आहे.३२. हा ऋग्वेद सुंदर अक्षरांचा, किंवा सुवर्णाच्या रंगाचा; अत्रिगोत्रोत्पन्न; गायत्र्यादि छंदांनी सुबद्ध आहे. ह्याचे **दैवत** ब्रह्मा आहे. ह्याच्या ध्यानाची दोन हात उंच, विशाल नेत्रांची आणि रुंद खांद्याची आहे.३३.

**शाकला बाष्कला तस्याः सांख्यायन्याश्वलायनि । माण्डूक्येत्थं पञ्च शाखा अष्टौ विकृतयस्त्वृचः ।।३४।।**
**निरुक्तं व्याकृतिर्ज्योतिश्छन्दः शिक्षा च कल्पकः । अस्येमानि षडङ्गानि वेत्तीमं कोऽद्य कृत्स्नशः ।।३५।।**
**पञ्चारत्निमितोऽर्काभः कपाली कृशदीर्घकः । यजुर्वेदो धनुर्वेदः क्षत्रेष्टोऽस्योपवेद उत् ।।३६।।**
**त्रिष्टुप्छन्दो भरद्वाज-गोत्रजो विष्णुदैवतः । षडशीतिभिदोऽङ्गानि प्राग्वदाष्टादशास्य तु ।।३७।।**
**परिशिष्टान्युपाङ्गानि षडेवैष इयान् ततः । क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी तृतीयकः ।।३८।।**

तस्यः शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि मांडूक्य इत्थं पञ्च शाखा। ऋचः अष्टौ विकृतयः।३४। अस्य निरुक्तं, व्याकृतिः, ज्योतिः, छंदः, शिक्षा च कल्पकः इमानि षड्+अङ्गानि। अद्य इमं कृत्स्नशः कः वेत्ति?३५। यजुर्वेदः पञ्च+अरत्नि+मितः अर्काभः कृश+दीर्घकः। उत क्षत्र+इष्टः धनुर्वेदः अस्य उपवेदः।३६। त्रिष्टुप्+छंदः भरद्वाज+गोत्रजः विष्णुदैवतः षड्+अशीति+भिदः, अस्य अङ्गानि पूर्ववत्, तु अष्टादश (परिशिष्टानि),।३७। उपाङ्गानि षट् एव। इयान् (यजुर्वेदः) ततः। तृतीयकः क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी।३८।

ऋग्वेदाच्या शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि आणि मांडूक्य अशा पांच **शाखा** आहेत; आणि जटा, माला, शिखा, लेखा, ध्वज, दण्ड, रथ, घन अशा आठ **विकृती** आहेत.३४. निरुक्ती, व्याकरण, ज्योतिष्, छंद, कल्प आणि शिक्षा ही या ऋग्वेदाची सहा **अंगे** आहेत. आजच्या काळांत ह्याला पूर्णपणे कोण जाणतो? अर्थात् कुणीही नाही.३५.

**यजुर्वेद -** आतां यजुर्वेदाविषयी सांगतात. हा पांच हात उंचीचा, सूर्यसंकाश, कृश आणि उंच आहे. तसेच क्षत्रियांना प्रिय असलेला धनुर्वेद याचा **उपवेद** आहे.३६. ह्याचा त्रिष्टुप् **छंद** आहे, **गोत्र** भरद्वाज आहे आणि **दैवत** विष्णु आहे. ह्याचे शाऐंशी **भेद** असून ह्याला अठरा **परिशिष्टे** आहेत.३७. याचीही उ**पांगे** सहाच आहेत. असा ह्या यजुर्वेदाचा विस्तार आहे.३८.

**षडरत्निमितोऽस्योप-वेदो गान्धर्वसंज्ञकः । रुद्राधिदेवो जगतीच्छन्दः काश्यपगोत्रजः ।।३९।।**
**हता नष्टाश्चापि शिष्टा नवाष्टौ च भिदोऽस्य तु । सामाङ्गोपाङ्गभेदेन कः पुमान्वेदितुं क्षमः ।।४०।।**
**चण्डस्तीक्ष्णोऽसितः काम-रूपी क्षुद्रक्रियोऽशुभः । स्वदारातुष्टोऽथर्वाख्यः शस्त्रास्त्रोपाङ्गवेद उत् ।।४१।।**

षड+अरत्नि+मितः। अस्य उपवेदः गान्धर्वसंज्ञकः। अधिदेवः रुद्रः। जगती छन्दः काश्यपगोत्रजः।३९। अस्य तु भिदः हता नष्टाः च अपि तु नव+अष्टौ शिष्टाः। साम अङ्ग+उपाङ्ग+भेदेन वेदितुं पुमान् क्षमः किम्?४०। अथर्वाख्यः चण्डः, तीक्ष्णः, असितः, कामरूपी, क्षुद्रक्रियः अशुभः स्व+दारा+तुष्टः शस्त्रास्त्र+उपाङ्ग+वेदः।४१।

**सामवेद -** तिसरा सामवेद क्षमाशील, निग्रही, शुचि, नित्य हार घालणारा, ढाल व काठी घेतलेला, सहा हात उंच आहे. याचा **उपवेद** गांधर्ववेद (संगीत) आहे. सामवेदाची **देवता** रुद्र, **छंद** जगती आणि **गोत्र** काश्यप आहे.३९. ह्याचा सहस्रावधी शाखांतून कित्येक इंद्राने चोरल्या तर कांही कालौघांत नाश पावल्या. तरीही आसुरायणी, वार्तान्तवेया, वासुरायणी, प्राञ्जली, ऋग्वेनविधा, प्राचीनयोग्या, ज्ञानयोग्या आणि राणायनी आठ शाखा शेष आहेत. त्यांतील राणायनीच्या आणखी नऊ शाखा आहेत. त्या अशा - राणायनीया, शाट्यायनीया, शाट्या, मुद्गला, खल्वला, महाखल्वला, लाङ्गला, कौथुमा, गौतमा आणि जैमिनीया.४०.

**अथर्ववेद -** चौथा अथर्व नांवाचा वेद चण्ड व तीक्ष्ण (अभिचारादि प्रयोगांचा प्रवर्तक), इच्छेला येईल ते रूप धारण करणारा, वशीकरणादि ऐहिक फल देणाऱ्या क्षुद्र क्रियांचा प्रवर्तक आणि स्वपत्नीत संतुष्ट आहे. अभिचार आणि वशीकरणादि प्रयोगांमुळे हा पतनाला कारण होतो म्हणून याला अशुभ म्हटले असले तरी ईश्वरप्रीतीसाठी ह्याचे सेवन केले तर तो शुभद मोक्षदायी होतो. किंवा याची उपनिषदे प्रश्न, मुंडक आणि मांडूक्य ही मोक्षप्रद आहेत आणि मोक्षानंतर शुभ राहत नाही असा अशुभ. याला तैत्तिराय उपनिषदांत पुच्छाबरोबरच प्रतिष्ठा असेही म्हटले आहे.४१.

**बैजानगोत्रजोऽनुष्टुप्छन्दा एषैन्द्रदैवतः । नवास्य भेदाः संपूर्णाः कल्पाः पञ्चात्र वेत्ति कः ।।४२।।**
**वर्षेऽद्य भारते कर्म-भ्रष्टा हीना द्विजातयः । वेदान्क्रीणन्त्यन्त्यजाग्रे सत्त्वहीना अतोऽभवन् ।।४३।।**
**उत्सृष्टोपाकृताभ्यस्त-गुप्तवेदमनुर्भुविः । किं न दास्यति विप्रेभ्यः प्रत्येकः कामधेनुवत् ।।४४।।**
**देवाधीनं जगन्मन्त्र-निघ्ना देवास्तु मन्त्रकाः । ब्रह्माधीना ब्राह्मणा मे देवता विष्णुरब्रवीत् ।।४५।।**

एष बैजानगोत्रजः, अनुष्टुप्+छन्दा, ऐन्द्र+दैवतः। अस्य भेदा नवा, कल्पाः पञ्च, कः संपूर्णाः वेत्ति?४२। अद्य भारते वर्षे कर्मभ्रष्टा हीना द्विजातयः अन्त्यज+अग्रे वेदान् क्रीणन्ति अतः सत्त्व+हीना अभवन्।४३। देवाधीनं जगत्, देवाः तु मंत्र+निघ्नाः, मन्त्रकाः ब्रह्म+अधीना, ब्राह्मणा मे देवता विष्णुः अब्रवीत्।४४। उत्सृष्ट+उपाकृत+अभ्यस्त+गुप्त+ वेद+मनुः प्रत्येकः विप्रेभ्यः भुवि कामधेनुवत् किं न दास्यति?४५।

हा अथर्ववेद **बैजानगोत्री** आहे; याचा **छंद** अनुष्टुप् आहे; आणि **देवता** इन्द्र आहे. याच्या पैप्पला, प्रथमा, दांता, प्रदांता, आख्याता, स्तौता, ख्याता, ब्रह्मदावला आणि शौनकेया अशा नऊ **शाखा** असून याला विधान, नक्षत्र, संहिता, शांती आणि विधिविधान असे पांच **कल्प** आहेत. या सर्वांचे संपूर्ण ज्ञान कुणाला बरे होऊं शकेल?४२.

आज ह्या भरतवर्षांत ब्राह्मणांनी आचार सोडल्यामुळे ते हीन झाले आहेत; अंत्यजांपुढे वेदाचा विक्रय करतात आणि त्यामुळे त्यांचे मंत्रसामर्थ्य लुप्त झाले आहे. ते केवळ मंत्राचे अक्षरधारी झाले आहेत.४३. शिक्षा या वेदांगाला अनुसरून (*'सुतीर्थादागतं व्यक्तं स्वाम्नाय्यं सुव्यवस्थितम्। सुस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते।।'* पाणिनीय शिक्षा ५१) मौखिक परंपरेने शिकलेला, उत्सर्जन आणि उपाक्रमाने टिकविलेला आणि भोजनादि नियमपालनाने आणि स्त्रीशूद्रादिकांच्या संपर्कापासून राखलेला एकेक वेदमंत्रसुद्धा ब्राह्मणाला काय देऊं शकणार नाही? सर्व कांही देईल. या भूमीवर तो कामधेनूसमानच आहे. एका मंत्राचे हे सामर्थ्य आहे. मग संपूर्ण वेदाचे सामर्थ्य केवढे असेल?४४. जग देवतांच्या अधिष्ठानावर टिकून आहे. ऋग्वेदाच्या प्रतिपादनानुसार (१:४०:५) देवता मंत्रामध्ये अवस्थित आहेत. त्या मंत्रांच्या उच्चाराचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे. ते ब्राह्मण माझे दैवत आहेत असे साक्षात् विष्णू म्हणाले आहेत.४५.

**सर्वस्वदक्षिणा भूपैर्दत्तापि ब्राह्मणैः पुरा । नात्ता कृतोऽद्रिस्तृणवत् सुसत्त्वाच्चाद्रिवत्तृणम् ।।४६।।**
**वशसर्वामरास्तेऽपि तदा स्वल्पज्ञमानिनः । युवां भ्रष्टौ भ्रष्टमन्त्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ ।।४७।।**
**आत्मस्तुतिपरौ ब्रह्म-द्विषौ साध्वात्मवञ्चकौ । त्वत्तुल्या ये पुरा जाता जातास्ते ब्रह्मराक्षसाः ।।४८।।**

'पुरा भूपैः सर्वस्व+दक्षिणा दत्ता अपि ब्राह्मणैः न अत्ता। सुसत्त्वात् अद्रिवत् तृणं, अद्रिः तृणवत्, च कृतः।४६। तदा वश+सर्व+अमरा अपि ते स्वल्पज्ञ+मानिनः। युवां भ्रष्टौ, भ्रष्ट+मंत्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ।४७। आत्म+स्तुति+परौ, ब्रह्म+द्विषौ साधु+आत्म+वंचकौ। पुरा ये त्वत्+तुल्या जाता ते ब्रह्मराक्षसाः जाताः।'४८।

'पूर्वीच्या काळी राजे-महाराजांनी सर्वस्वाचीही दक्षिणा देऊ केली असता ती ब्राह्मणांनी स्वीकारली नाही. कारण प्रतिग्रह हा तपाच्या तेजाचा नाशक असतो. त्यामुळे त्यांच्या मंत्रांत उत्कृष्ट सामर्थ्य होते. त्यामुळे ते गवताच्या काडीचाही पर्वत करीत तर पर्वताला कस्पटासमान करीत.'४६. तैत्तिरीय आरण्यकांत (२:१५) सांगितल्याप्रमाणे अशा त्या वेदवित् ब्राह्मणांच्या ठिकाणी जेवढ्या कांही देवता आहेत त्या वास करतात. असे सर्व देवतांवर प्रभुत्व असलेले ते ब्राह्मणसुद्धां स्वतःला स्वल्पज्ञच मानीत असत. त्यांना कसलाही गर्व किंवा मत्सर नव्हता. त्या गर्विष्ठ ब्राह्मणांना श्रीगुरू म्हणतात, 'तुम्ही मात्र आचारभ्रष्ट, जातिभ्रष्ट आणि मंत्रभ्रष्ट असून थोडक्याच वेदाभ्यासाने स्वतःला विद्वान् समजता. आपली आपणच स्तुती करता, आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठी ब्राह्मणांचा द्रोह करता आणि आपल्या सरलस्वभावी आत्म्याचीही वंचना करता! पूर्वी जे तुमच्यासारखे झाले त्यांना ब्रह्मराक्षसाच्या योनीत जावे लागले.'४७-४८.

**।। विप्रावूचतुः ।।**

**नैतावच्छ्रोतुमाप्तौ स्वो विवादं कुरु चेन्न वाम् । तच्छक्तिर्जयपत्रं नौ युवाभ्यां दीयतामिति ।।४९।।**
**तथेत्युक्त्वोद्वीक्ष्य यान्तमानयित्वान्त्यजं प्रभुः । लेखा उल्लिख्य सप्ताभ्युत्क्रामयन्तमवाचयत् ।।५०।।**
**प्राचीनसप्तजन्मज्ञो रेखास्पर्शनतोऽभवत् । आद्यां गत्वास्मि बुरडो मातंग इति भाषितम् ।।५१।।**
**द्वितीयां तु किरातोत्थो रावणाख्य इतीरितम् । तृतीयां च नदीतीरस्थो गाङ्गेय इतीरितम् ।।५२।।**

विप्रौ ऊचतुः। 'एतावत् श्रोतुं न आप्तौ स्वः। विवादं कुरु। वां तत्+शक्तिः न चेत् युवाभ्यां नौ जयपत्रम दीयताम्।' इति।४९। प्रभुः 'तथा' इति उक्त्वा यान्तं अन्त्यजं आनयित्वा, सप्त लेखा उल्लिख्य उत्क्रामयन्तम् अवाचयत्।५०। रेखा+स्पर्शनतः (सः) प्राचीन+सप्त+जन्म+ज्ञः अभवत्। आद्यां गत्वा 'मातंगः बुरुडः अस्मि' इति भाषितम्।५१। द्वितीयां तु 'किरातोत्थः रावणाख्यः' इति ईरितम्। तृतीयां च 'नदी+तीरस्थः गाङ्गेयः' इति ईरितम्।५२।

यावर ते ब्राह्मण म्हणाले, 'हे सगळे ऐकून घ्यायला आम्ही इथे आलो नाही. तुमच्यांत सामर्थ्य असेल तर आमच्याशी वाद करा. अन्यथा तुम्ही दोघे आम्हांला जयपत्र लिहून द्या.'४९. श्रीगुरूंनी 'ठीक तर,' असे म्हणून वाटेवरून जाणाऱ्या एका अंत्यजाला बोलावून घेतले. त्याच्यासमोर जमिनीवर सात रेघा काढून त्याला एकेक रेघ ओलांडायला लावली. प्रत्येक रेघ ओलांडून त्याला त्याची ओळख विचारली.५०. क्रमशः त्या रेघांना स्पर्श करताच त्याला त्या त्या पूर्वजन्माचे ज्ञान झाले. अशा रीतीने सध्याचा जन्म धरून त्याला सात जन्मांचे स्मरण झाले. पहिल्या रेघेवर येतांच तो 'मी मांग असून बुरुडाचा व्यवसाय करतो' असे म्हणाला.५१. दुसऱ्या रेघेशी येतांच तो 'आपण भिल्ल जातीचे असून आपले नांव रावण' असे सांगू लागला. तिसऱ्या रेघेवर तो स्वतःला 'नदीकाठचा कोळी' असल्याचे बोलू लागला.५२.

**चतुर्थीं वै कृषिपटुः शूद्रोऽस्मीत्यभिभाषितम् । पञ्चमीं सोमदत्ताख्यो वैश्योऽस्मीत्युदितं ततः ।।५३।।**
**षष्ठीं गोवर्धनाख्योऽहं क्षत्रः शूर इतीरितम् । सप्तमीं वेदशास्त्रज्ञो ब्राह्मणोऽस्मीति भाषितम् ।।५४।।**
**तदास्य मन्त्रितं भस्म क्षिप्त्वाङ्गे प्रभुराह तम् । चेद्वेदज्ञोऽसि विप्रौ द्राग्विवादेन पराजहि ।।५५।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तौ प्रत्याहितधियौ भिया । कम्पितौ श्रीगुरुं गत्वा विप्रौ शरणमूचतुः ।।५६।।**
**ब्रह्मद्विषौ स्वः पापिष्ठौ दुष्टसङ्गाहितभ्रमौ । मूढौ नौ दुर्गतिं यान्तौ समद्धर्तुं हरेऽर्हसि ।।५७।।**

चतुर्थीं वै 'कृषिपटुः शूद्रः अस्मि' इति अभिभाषितम्। पञ्चमीं 'सोमदत्ताख्यः वैश्यः अस्मि' इति उदितम्। ततः..।५३। षष्ठीं 'अहं गोवर्धनाख्यः शूरः क्षत्रियः' इति ईरितम्। सप्तमीं 'वेद+शास्त्र+ज्ञः ब्राह्मणः अस्मि' इति भाषितम्।५४। प्रभुः तदा अस्य अङ्गे मंत्रितं भस्म क्षिप्त्वा तं प्राह, 'चेत् वेदज्ञः असि, विप्रौ द्राक् विवादेन पराजहि।'५५। इति ईश+वाक्यं श्रुत्वा तौ भिया प्रत्याहत+धियौ कम्पितौ विप्रौ श्रीगुरुं शरणं गत्वा ऊचतुः।५६। (हे) हरे, नौ ब्रह्म+द्विषौ पापिष्ठौ, दुष्ट+संगा+हित+भ्रमौ मूढौ दुर्गतिं यान्तौ समुद्धर्तुं अर्हसि।५७।

चौथी रेषा ओलांडतांच तो स्वतःला 'शूद्र जातीचा शेतकरी' म्हणवू लागला तर पांचव्या रेषेजवळ 'सोमदत्त नांवाचा वैश्य' असल्याचे सांगूं लागला.५३. सहाव्या रेघेवर तो स्वतः 'गोवर्धन नांवाचा शूरवीर क्षत्रिय' असल्याचे सांगू लागला. शेवटची सातवी रेघ ओलांडतांच तो आपण 'वेदशास्त्र जाणणारे ब्राह्मण आहोत' असे म्हणाला.५४. श्रीदत्तप्रभूंनी त्या अंत्यजाच्या शरीरावर भस्म प्रोक्षण केले आणि त्याला म्हणाले, 'तूं वेदांचा जाणता आहेस ना? तर मग या दोघा ब्राह्मणांशी वाद करून त्यांचा पराभव कर!'५५. हे प्रभूंचे वचन ऐकून त्या ब्राह्मणांची भीतीने गाळण उडाली, बुद्धी काम करीना आणि ते थरथर कांपत श्रीगुरूंना शरण गेले आणि (खालीलप्रमाणे) बोलले.५६. 'पापताप हरणाऱ्या श्रीगुरो! आम्ही ब्रह्मद्वेषी, पापरत, कुसंगतीने मतिभ्रष्ट झालेले मूढ आहोत. आमचा नरकाच्या वाटेवरून उद्धार करा. तेच आपल्या ब्रीदाला शोभून दिसेल.५७.

|| श्रीगुरुरुवाच ||

**म्लेच्छाग्रे पठिता वेदा धिक्कृता ब्राह्मणा यतिः । तत्कर्मपरिपाकार्थं राक्षसौ द्राग्भविष्यथः ।।५८।।**
**सन्तप्तत्वाद्द्वादशाब्दानुषित्वा शान्तरूपतः । पठ्यमानानुवाकोप-देशाद्विप्राय वां गतिः ।।५९।।**
**इत्युक्तौ गुरुणा गत्वा भीमां स्नात्वा मृतावुभौ । राक्षसौ गुरुवाक्यात्तौ भूत्वा तत्रैव तस्थतुः ।।६०।।**
**तत्र यान्द्वादशाब्दान्ते द्विजो विस्मृतवान्मनुम् । तस्मै शशंसतुस्तं तौ तदा मुक्तौ स्वरीयतुः।।६१।।**

श्रीगुरुः उवाच। 'म्लेच्छ+अग्रे वेदा पठिता, ब्राह्मणा यतिः धिक्कृता। तत्+कर्म+परिपाक+अर्थं द्राक् राक्षसौ भविष्यथः।५८। संतप्तत्वात् शान्तरूपतः द्वादश+अब्दान् उषित्वा, विप्राय पठ्यमान+अनुवाक+उपदेशात् वां गतिः।'५९। इति गुरुणा उक्तौ भीमां गत्वा स्नात्वा उभौ मृतौ। गुरु+वाक्यात् तौ राक्षसौ भूत्वा तत्र एव तस्थतुः।६०। द्वादश+अब्द+अन्ते तत्र यान् द्विजः मनुं विस्मृतवान्। तौ तस्मै तं मंत्रं शशंसतुः। तदा मुक्तौ स्वः ईयतुः।६१।

श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'म्लेच्छ म्हणजे गोमांसभक्षक, धर्मविरुद्ध अति बोलणारा आणि कसलेही आचार न पाळणारा (बोधायनस्मृति). अशांच्या समोर तुम्ही वेदपठण केलेत; वेदांनी (कृ. यजु. तै. संहिता १:७:३:१) ज्यांना प्रत्यक्ष देवतास्वरूप मानले आहे आणि छांदोग्य उपनिषदांत ज्याची निन्दा करण्याला निषेध केला आहे अशा ब्राह्मणांचा धिक्कार तुम्ही केला आहे. संन्यासी हे साक्षात् गुरुस्वरूप आहेत. गुरुगीतेत (१०४) सांगितल्याप्रमाणे 'गुरूंचा अधिक्षेप करणारा आणि ब्राह्मणांना वादाने खाली पाहायला लावणारा निर्मनुष्य अरण्यांत राक्षस होतो.' या सर्व कर्मांच्या फलस्वरूप तुम्हांला तात्काळ ब्रह्मराक्षसांच्या योनीत जावे लागेल.५८ तुम्हांला आत्तां झालेल्या पश्चात्तापामुळे, तुम्ही बारा वर्षे शांत अवस्थेत राहाल. त्यानंतर एका ब्राह्मणाला त्याला न आठवणारा यजुर्वेदांतला अनुवाक सांगण्याने तुम्ही त्या राक्षसयोनीतून मुक्त व्हाल.' इथे उपदेश शब्द योजला असला तरी लाक्षणिक अर्थ 'सांगणे' असाच ग्राह्य आहे.५९. असा श्रीगुरूंचा निरोप मिळतांच ते उभयतां भीमेच्या तीरावर गेले. तिथे स्नान करतांच ते मरण पावले आणि ब्रह्मराक्षस होऊन तिथेच एका झाडावर राहिले.६०. बारा वर्षांनी तिथून जाणाऱ्या एका ब्राह्मणाला मंत्राचे विस्मरण झाले. त्याला त्यांनी तो मंत्र सांगतांच ते राक्षस मुक्त होऊन स्वर्गलोकाला गेले.६१.

**स्वधर्ममुत्सृज्य मदेन ये द्विजान् गुरून्द्विषन्तः खलु राक्षसा वने ।**
**भवन्ति पापोऽपि यदानुतापितः कनिष्ठशिक्षो भवति द्विजाविव ।।६२।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे वेदोपदेशो नाम प्रथमोऽध्यायः ।।१।।**

**आदितश्चतुर्दशोऽध्यायः ।।१४।।**

**सप्ताहपारायणे तृतीयः। अन्ते रसज्ञा वशा.. स्तोत्रं पठनीयम् । अन्यदिने आरंभे गुरुस्तुतिः ।**

ये स्वधर्मं उत्सृज्य मदेन द्विजान् गुरून् द्विषन्तः (ते) खलु वने राक्षसा भवन्ति। पापः अपि यदा अनुतापितः द्विजौ इव कनिष्ठ+शिक्षो भवति।६२।

जे आपला धर्माचार टाकून मदांध होऊन ब्राह्मणांचा आणि गुरूचा द्वेष करतात ते नक्कीच अरण्यांत राक्षस होतात. पापी जरी असला तरी त्याला पश्चात्ताप झाला तर मात्र त्या ब्राह्मणासारखीच त्याची शिक्षा कमी होते.६२.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला पहिला आणि प्रथमपासून चौदावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पञ्चदशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पतितस्य ततो जातं किमु हीनोऽप्यनुग्रहात् । श्रीमद्भगवतो वेद-शास्त्रज्ञोऽस्मीति योऽब्रवीत् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**प्रसादात्सद्गुरोर्ज्ञानी भूत्वाह पतितो हरिम् । ब्राह्मणस्यापि मे कस्मादधःपातोऽभवद्धरे ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**कर्मणा भ्रममाणस्य यन्त्रवत्पुण्यपापतः । प्रकृत्यायत्तचेष्टस्य जन्तोरूर्ध्वमधोगती ।।३।।**

नामधारक उवाच। 'श्रीमद्भगवतः अनुग्रहात् यः वेद+शास्त्र+ज्ञः अस्मि इति अब्रवीत् (तस्य) पतितस्य उ ततो किं जातम्?'१। सिद्ध उवाच। 'सद्गुरोः प्रसादात् ज्ञानी भूत्वा पतितो हरिं आह, (हे) हरे, मे ब्राह्मणस्य अपि कस्मात् अधःपातः अभवत्?'२। श्रीगुरुः उवाच। कर्मणा यन्त्रवत् भ्रममाणस्य प्रकृति+आयत्त+चेष्टस्य जन्तोः पुण्य-पापतः ऊर्ध्वं+अधो+गतिः।३।

**श्रीगणेशाय नमः। अथ पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाक उपदेशुनी पंचादशीं अंत्यजाचे ज्ञान हरिले। यतीला प्रायश्चित्त तसे भस्ममाहात्म्य निरूपिले।।१।।** मागील अध्यायांत माझ्या वर्तनाला प्रमाण मानून लोक तसेच आचरण करतील, हे बरे नव्हे हा श्रीगुरूंचा विचार मांडून वेदांचा अवमान आणि ब्राह्मणांचा अधिक्षेप केल्याने ब्राह्मणाचाही कसा अधःपात होतो ते सांगितले. आता संवादरूपाने दुष्कर्माने दुर्गती तसेच प्रायश्चित्ताने संशुद्धी कशी होते ते सांगत आहेत.

नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, 'भगवान श्रीगुरूंच्या प्रसादाने अंत्यज असूनही 'मी वेदशास्त्रांचा जाणकार आहे' असे म्हणणाऱ्या त्या पतिताचे पुढे काय झाले?'१. सिद्धमुनी म्हणाले, सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने ज्ञानी झालेला तो अंत्यज पापहर सद्गुरूंना संबोधून म्हणाला, 'मी पूर्वजन्मी ब्राह्मण असूनही मला हा अंत्यजाचा जन्म कां आला?'२. श्रीगुरू त्याला सांगूं लागले. 'कर्माच्या चक्रावर यन्त्राप्रमाणे फिरत असलेल्या, प्रकृतीला अनुसरून विविध कर्मे करणाऱ्या जीवाची पुण्याने ऊर्ध्वगती आणि पापाने अधोगती होते.'३.

**गुरुमातापितृस्त्र्यर्भ-धर्माचारकुलेश्वरान् । यो जहाति मुधा सोऽपि जीवहिंस्रोऽनृतप्रियः ।।४।।**
**खलः कन्याश्वगोक्रेता गृहग्रामवनाग्निदः । त्यक्तश्राद्धः परान्नाशीः कालाप्तातिथिहापकः ।।५।।**
**सद्विप्रदेवतीर्थार्च्य-वेदशास्त्रादिनिन्दकः । तडागकूपारामाध्व-क्रतुध्वंसी व्रताहभुक् ।।६।।**
**श्राद्धार्च्याहाम्बुपर्वाह्नि-स्त्रीभुग्विश्वासघातकः । दत्तदानहरः स्वोक्त-व्यस्ताचारोऽन्यकर्मकृत् ।।७।।**

यो गुरु+माता+पितृ+स्त्री+अर्भ+धर्म+आचार+कुलेश्वरान् मुधा जहाति सः अपि जीव+हिंस्रः अनृत+प्रियः।४। खलः कन्या+अश्व+गो+क्रेता गृह+ग्राम+वन+अग्नि+दः त्यक्त+श्राद्धः परान्नाशीः काल+आप्त+अतिथि+हापकः।५। सत्+विप्र+देव+तीर्थ+अर्च्य+वेद+शास्त्र+आदि+निंदकः; तडाग+कूप+आराम+अध्व+क्रतु+ध्वंसी; व्रत+आह+भुक्; ।६। श्राद्ध+अर्चा+अहे अम्बु+पर्व+अह्नि स्त्रीभुक्; विश्वास+घातकः; दत्त+दान+हरः; स्व+उक्त+व्यस्त+आचारः; अन्य+कर्म+कृत्;।७।

इथे श्रीगुरू बुरुडाने विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरी चंडाल या नीचतम जातीत जन्म घेण्यास कारणीभूत कर्मे सांगत आहेत. गुरू, आई, वडील, पत्नी, (स्वतःचे) मूल, धर्माचे आचरण तसेच कुलदैवत यांचा, निष्कारण त्याग करणारा; जीवांची हिंसा करणारा; असत्य भाषण करणारा;४. दुष्ट माणूस; मुलगी, घोडा किंवा गाय यांना विकणारा; घराला, गांवाला किंवा वनाला आग लावणारा; श्राद्ध न करणारा; परान्नावर जगणारा; जेवणाच्या वेळी आलेल्या अतिथीला हाकलून देणारा;५. साधुसंत, ब्राह्मण, तीर्थ, पूज्य व्यक्ती, वेद, शास्त्र इत्यादींची निंदा करणारा; तलाव, विहीर, बाग, मार्ग, यज्ञ यांचा नाश करणारा;६. श्राद्धाच्या, एकादशी वगैरे व्रताच्या किंवा पूजेच्या दिवशी, पाण्यांत, दर्शादि पर्वकाळांत स्त्रीशी संभोग करणारा; विश्वासघातकी; दान दिलेली वस्तू परत घेणारा; एक बोलून दुसरेच करणारा; आपल्याला अधिकार नसलेले कर्म करणारा;७.

**स्वपुण्यपरपापास्यो दम्भाद्यैः सत्त्वदर्शकः । खलहिंस्रस्तेयिसङ्गी घातज्ञो जारणादिकृत् ।।८।।**
**ज्ञानं विना चिकित्साशी कर्मभ्रष्टोऽन्यतापकृत् । इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डालयोनिगाः ।।९।।**
**क्रोधी शूद्रीरतस्त्यक्तनित्यनैमित्तिकक्रियः । वृषगोवृषलीसक्तोरसगोवेदविक्रयी ।।१०।।**
**अदत्वेशं कपिलगोदुग्धपोऽतिनिषिद्धभुक् । प्रतिग्रही पराजीवजीवी सन्ध्याशयी कुवाक् ।।११।।**
**इत्याद्या ब्राह्मणास्तेऽपि पूर्ववत्संभवन्ति हि । जीवजातिमिताः सन्ति नरका एकविंशतिः ।।१२।।**

स्व+पुण्य+पर+पाप+आस्यः, दम्भ+आद्यैः सत्त्व+दर्शकः, खल+हिंस्र+स्तेयि+संगी, घातज्ञः, जारण+आदि+कृत्,।८। ज्ञानं विना चिकित्साआशीः, कर्मभ्रष्टः, अन्य+ताप+कृत् इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डाल+योनिगाः।९। क्रोधी, शूद्रीरत, त्यक्त+नित्य+नैमित्तिक+क्रियः वृषगः वृषली+सक्तः, रस+गो+वेद+विक्रयी,।१०। ईशं अदत्वा कपिल+गो+दुग्धपः, अतिनिषिद्ध+भुक्, प्रतिग्रही, पराजीव+जीवी, सन्ध्या+शयी कुवाक्।११। इत्याद्या ब्राह्मणाः ते अपि पूर्ववत् संभवन्ति हि। जीवजातिमिताः नरकाः सन्ति। (तेषु) एकविंशतिः।१२।

आपले पुण्य आणि दुसऱ्याचे पाप बोलून दाखविणारा; दंभ वगैरेनी आपल्या साधुत्वाची जाहिरात करणारा; दुष्ट, हिंसक, चोर यांच्या संगतीत असणारा; घातकी; जारण-मारणादि प्रयोग करणारा;८. वैद्यकाचे ज्ञान नसतांना औषधोपचार करून पैसे कमावणारा; आपल्या विहित कर्माचा त्याग करणारा; दुसऱ्यांना पीडा करणारा इत्यादि मृत्यूनंतर नरक भोगून चण्डाल योनीत जन्म घेतात.९. कोपिष्ट, शूद्रस्त्रीशी संग करणारा, नित्य व नैमित्तिक कर्मांचा त्याग करणारा, बैलावर बसणारा, कलावंतिणीवर आसक्त असलेला, विषारी पदार्थ, गाय किंवा वेद यांचा विक्रय करणारा,१०. कपिला गाईचे दूध ईश्वराला अर्पण न करता आपणच पिणारा, कांदा, लसूण इत्यादि अतिनिषिद्ध पदार्थ खाणारा, दुष्टाचे दान घेणारा, दुसऱ्याची उपजीविका हरण करणारा, संध्याकाळी झोपणारा, तोडात सतत शिवीगाळी असणारा,११. इत्यादि ब्राह्मणही वरीलप्रमाणेच नरक भोगून हीन जातीत जन्म घेतात. जीवांच्या योनीइतकेच म्हणजे ८४ लक्ष इतके नरक आहेत.१२.

**तेषु श्रेष्ठा जीवपापविपाका अन्तकालये । तेष्वन्तकः क्षिपत्येतान्पापिनः पापभुक्तये ।।१३।।**
**त्यक्त्वा पुष्टमपीह वर्ष्म कलुषी यान्यातनाङ्गेन तृट्- । क्षुच्छीतोष्णसुपीडितो यमचरैर्बद्धोऽयने दुर्गमे ।।**
**मूर्छन् तर्जनताडनादिभिरसन्वै वैतरिण्यर्दितो । भुङ्क्ते याम्यमवाप्यराष्ट्रमवशस्तां यातनां नारकीम् ।।१४।।**
**ततो योन्यन्तरे याति भुक्तदुःखोऽप्यघांशतः । प्रायशो वासनाभूम्नो भूतप्रेतपिशाचताम् ।।१५।।**

अन्तक+आलये तेषु (एकविंशति) श्रेष्ठाः जीव+पाप+विपाकाः। तेषु अन्तकः पापिनः पापभुक्तये क्षिपन्ति।१३। कलुषी इह पुष्टं अपि वर्ष्म त्यक्त्वा यातना+अङ्गेन यमचरैः बद्धः क्षुत्+शीत+उष्ण+सुपीडितः दुर्गमे अयने यान् असन् तर्जन+ताडनादिभिः मूर्छन् वै वैतरिणी अर्दितः अवशः याम्यं राष्ट्रं अवाप्य तां नारकीं यातनां भुङ्क्ते।१४। ततः भुक्त+दुःखः अपि अघ+अंशतः योनि+अंतरे याति। वासना+भूम्नः प्रायशः भूत+प्रेत+पिशाचतां (याति)।१५।

(पण त्यांतील २१...) जीवांच्या पापांचा परिपाक अशा त्या नरकांतील एकवीस मुख्य आहेत. यमाच्या नगरीत हे सर्व नरक आहेत. यमराज पापी लोकांना त्यांच्या पापाचा भोग देण्यासाठी यांत टाकतो.१३. मृत्यूनंतर पापी जीव आपला स्थूल देह कितीही पुष्ट असला तरी तो इथेच टाकून यातनादेह धारण करतो. यमदूत त्याच्या त्या यातनादेहाला बांधून, तहान, भूक, शीत, उष्ण इत्यादींनी तळमळत, दुर्गम आणि कठीण मार्गाने त्याला ठोकत, मारत, ओढून घेऊन जातात. वैतरिणी नदीतून असह्य कष्ट भोगीत तो पापी जीव विवश होऊन यमाच्या देशात पोचतो. आणि तिथे तो आपल्या पापाला अनुसरून भयंकर आणि अनिर्वाच्य नरकयातना भोगतो.१४. तिथे - यमलोकांत, यातना भोगल्यानंतर अवशिष्ट पापामुळे दुसऱ्या योनीत जन्म घेतो. ज्या जीवांच्या वासना प्रचुर आहेत त्यांना बहुधा भूत, प्रेत किंवा पिशाच योनीत जावे लागते.१५.

**हुंतुंकाराद्गुरोर्विप्राभिभवाद्ब्रह्मराक्षसः । गर्दभो हीनसेवी स्यात् कुक्कुटोऽतिथिहापकः ।।१६।।**
**उष्ट्रोऽर्थहृद्वनचरः फलपत्रार्थहृद्भवेत् । मधु दंशः पलं गृध्रोऽन्नमाखुश्चातको जलम् ।।१७।।**

गुरोः हुं-तुंकारात्, विप्र+अभिभवात् ब्रह्मराक्षसः, हीन+सेवी गर्दभः, अतिथि+हापकः कुक्कुटः स्यात्।१६। अर्थहृत् उष्ट्रः, फल+पत्र+अर्थ+हृत् वनचरः, मधु(हृत्) दंशः, पलं(हृत्वा) गृध्रः, अन्नं (हृत्वा) आखुः, जलं (हृत्वा) चातकः।१७।

**मृत्यूने सर्व कर्मांचा नाश होत नाही. -** एकाच कर्माची परस्परविरोधी अशा विविध योनीत भोगतां येणारी फळे आहेत, तसेच (ब्रह्महत्यादि) एकेका कर्मापासून वेगवेगळ्या अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो, असे शास्त्रवचन आहे. स्थावरादि योनीत गेलेल्या अत्यंत मूढ योनीतील जीवांना वरच्या योनीत जाण्याचे कर्म करतां येत नाही; गर्भावस्थेतच स्राव झालेल्या जीवांकडून कांहीही कर्म घडूंच शकत नाही. म्हणजे या सर्वांचे संसरणच थांबायला हवे. पण तसे होत नाही. त्यामुळे असे निश्चित होते की एकाच जन्मांत सर्वच कर्मांचा उपभोग होऊ शकत नाही. कांही लोक असे म्हणतात की 'मृत्यूच्या वेळी सर्व कर्मांच्या आधाराचा (वासनांचा) उपमर्द झाल्यावरच नव्या जन्माचा आरंभ होतो. त्यांच्या मते कांही कांही कर्मे (भावी जन्मांच्या) आरंभकत्वाने स्थिर राहतात व कांही जन्मांतराला कारणीभूत होतात हे सयुक्तिक नाही. 'मरण हे सर्व कर्मांना अभिव्यक्त करते, जसा दिवा आपल्या आसमंतांतील सर्व वस्तूंना अभिव्यक्त करतो. अर्थात् नवा जन्म आरंभ होतांनाच आधीच्या सर्व कर्मांचा नाश होतो.' हे मत खरे नाही. सर्वाच्या (इथे संपूर्ण कर्माशयाच्या) सर्वात्मकत्वामुळे, देश, काल आणि निमित्त यांच्या मर्यादांमुळे, सर्वात्मनाचा अंशतः उपमर्द किंवा कधी कांही अभिव्यक्ति असे होत नाही. तसेच कर्मांच्या आणि त्यांच्या आश्रयांच्या (वासना) विषयी आहे. पूर्व जन्मी अनुभवलेल्या मर्कट, मनुष्य, मोर इत्यादि जन्मांनी संस्कारित अशा अनेक वासना मर्कट जन्माला कारणीभूत कर्माने - मर्कट जन्माच्या आरंभाने नष्ट होत नाहीत तशीच अन्य जन्मांत प्राप्त झालेली कर्मेही नाश पावत नाहीत हे सयुक्तिकच आहे. मर्कट योनीत जन्म झाल्याने मागील सर्व जन्मांत अनुभवलेल्या वासनांचा नाश होतो असे मानले तर माकडाच्या

**गन्धान् छुच्छुन्दरी धान्यं शलभोऽलिर्विषं तथा । कृमिः कीटः पतङ्गः स्यात् स्वर्णं हृत्वा तृणं पशुः ।।१८।।**
**काको निर्मन्त्रभुग्गृध्रो मित्रध्रुग्दाम्भिको बकः । इत्याद्या बहुशो योनीर्भुक्त्वा रुग्णा भवन्त्यथ ।।१९।।**

गन्धान् (हृत्वा) छुच्छुंदरी, धान्यं शलभः, विषं अलिः, स्वर्णं हृत्वा कृमिः, कीटः, पतङ्गः, तृणं (हृत्वा) पशुः स्यात्।१८। निर्मन्त्र+भुक् काकः, मित्र+ध्रुक् गृध्रः, दाम्भिकः बकः (स्यात्)। इत्याद्या बहुशः योनीः भुक्त्वा अथ रुग्णा भवन्ति।१९।

एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडी मारण्याचे जन्मजात कौशल्य, तसेच आईच्या पोटाला चिकटून राहण्याचे कौशल्य त्याला कुठून आले? ह्या जन्मी तरी त्याचा त्याने अभ्यास केलेला नाही. तसेच या जन्माच्या आधीचा त्याचा जन्म मर्कटाचाच असेल असे सांगतां येत नाही. मृत्यूच्या वेळी 'जीव आपले ज्ञान, कर्म आणि पूर्वानुभव यांना घेऊन जातो' असे बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) म्हटले आहे. यावरून वासनांप्रमाणेच सर्व कर्मांचा उपमर्द होत नाही. ज्या अर्थी शेष कर्म आहे त्या अर्थी त्यापासून अन्यान्य योनीत जन्म घ्यावा लागणार अशी संसाराची उपपत्ती लागते.

गुरूंना 'हुं', 'तुं' इत्यादि अवमानकारक बोलल्याने आणि ब्राह्मणांचा पराभव करण्याने ब्रह्मराक्षसाचा, खालच्या जातीची सेवा करण्याने गाढवाचा तर अतिथीला हाकलणाऱ्यास कोंबड्याचा जन्म येतो.१६.

**चोरीची फळे -** कोणत्या पदार्थाची चोरी केल्याने कोणती योनी मिळते हे पुढे सांगत आहेत. द्रव्य चोरणारा उंट, फळे-पाने चोरणारा वानर, मध चोरणारा गांधिलमाशी, मांस चोरणारा गिधाड, अन्न चोरणारा उंदीर तर पाण्याची चोरी करणारा चातक होतो.१७. गंधचोर चिचुंद्री, धान्यचोर टोळ, विषचोर विंचू, सुवर्णचोर कृमी, कीट वा पतंग आणि गवत चोरणारा पशू होऊन जन्माला येतो.१८. आमंत्रण नसतांना (आगंतुक) जेवणारा कावळा, मित्रद्रोही गिधाड, दंभ करणारा बगळा होतात. अशा अनेक योनीत फिरून उरलेल्या पापांशाने तो इथे मनुष्यजन्मात रोगी होतो.१९.

**हृद्रोगी परहृद्भेत्ता गुरुत्यागी महामयी । क्षयी तु ब्रह्महा कुष्ठी स्वर्णहृत्पुस्तकापहा ।।२०।।**
**जन्मान्धो विश्वासघाती वमी गण्डी गणार्थहृत् । अपुत्रोऽन्यार्थहृद्वस्त्र-हृच्छ्वित्री चानृती कुवाक् ।।२१।।**
**गुल्म्यन्नहृत्कुरुङ्मांस-भोक्ता क्वास्यस्तु तैलहृत् । पामी फलादिहृच्छ्वित्री कांस्यकार्पासलोहहृत् ।।२२।।**
**देवार्थहृत्पाण्डुरोगी रोगाः सर्वेऽत्र पापतः । परस्त्र्यालिङ्गनाज्जन्म शतं श्वा तद्भगेक्षकः ।।२३।।**
**अन्धो बन्ध्वङ्गनाभोगी गर्दभोऽहिश्च दुर्धिया । परस्त्र्यालिङ्गनान्नूनं हृद्रोगी ह्यष्टधा रतिः।।२४।।**

पर+हृद्+भेत्ता हृद्+रोगी, गुरु+त्यागी महामयी, ब्रह्महा तु क्षयी, स्वर्ण+हृत् कुष्ठी, पुस्तक+अपहा जन्मांधः,।२०। विश्वास+घाती वमी, गणार्थ+हृत् गण्डी, अन्य+अर्थ+हृत् अपुत्रः, वस्त्र+हृत् श्वित्री च अनृती कुवाक्।२१। अन्नहृत् गुल्मी, मांसभोक्ता कुरुक्, तैलहृत् तु कु+आस्यः, फलादिहृत् पामी, कांस्य+कार्पास+लोह+हृत् श्वित्री।२२। देवार्थहृत् पांडुरोगी, अत्र सर्वे रोगाः पापतः। पर+स्त्री+आलिंगनात् जन्म+शतं श्वा, तत्+भग+ईक्षकः अन्धः,।२३। बन्धु+अङ्गना+भोगी गर्दभः, पर+स्त्री+आलिंगनात् नूनं हृद्+रोगी हि अष्टधा रतिः।२४।

कुणाच्याही मर्मी लागेल असे बोलणाऱ्याला हृदयरोग होतो. गुरूचा त्याग करण्याने कुष्ठरोगी, ब्रह्महत्या करणारा क्षयी तर पुस्तक चोरणारा जन्मांध होतो.२०. विश्वासघातकी वांतिरोगी, सामूहिक द्रव्याचा अपहार करणारा गंडमाळारोगी, परद्रव्यापहारी निपुत्रिक, वस्त्रे चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२१. अन्न चोरणारा गुल्मरोगी (कर्करोगी), मांस खाणारा गलत्कुष्ठी, तेल चोरणारा वांकड्या तोंडाचा, फळे वगैरे चोरणारा त्वचारोगी (खरुज वगैरे), कांसे, कापूस किंवा लोखंड चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२२. देवस्वाचा अपहार करणारा पांडुरोगी होतो. ह्या मनुष्यदेहात सर्वच रोग पापापासून होतात.२३. **व्यभिचार -** आता व्यभिचारकर्माची फळे सांगतात. परस्त्रीला आलिंगन दिले तर तो शंभर जन्म कुत्रा होतो; तिची (परस्त्रीची) योनी पाहिली तर आंधळा होतो; बंधुभार्येशी संभोग करणारा गाढवजन्माला जातो; परस्त्रीला आलिंगन दिले तर हृदयविकार होतो. नुसत्या आलिंगनानेही कसे पाप लागते याचे स्पष्टीकरण म्हणून रतीचे (कामक्रीडेचे) आठ प्रकार असतात असे स्पष्ट केले आहे. स्मरण, कीर्तन, क्रीडा, प्रेक्षण, उत्साह, अध्यास आणि प्रत्यक्ष संभोग असे आठ मैथुनाचे प्रकार अग्निपुराणांत वर्णिले आहेत. (*'स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणं। उत्साहोऽध्यवसायच क्रियानिष्पत्तिरेव च'।।३१०:९-१०*)२४.

**श्वा मातुलसखिस्त्रीभुक् कृमिः स्यादौपपत्यतः । स्वैरिण्योऽपि स्त्रियः श्वादि-योनिं गत्वा व्यथन्त्यलम् ।।२५।।**
**इति संवादमाकर्ण्य गुरुं प्राह त्रिविक्रमः । ज्ञानाद्वाऽज्ञानतो जातं कथं पापं प्रणश्यति ।।२६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पश्चात्तापेन संशुद्धिः प्रायश्चित्तादिभिः पुनः । सदस्युच्चार्य पापं स्वं ब्रह्मदण्डं निधाय च ।।२७।।**
**सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृतपापानुसारतः । कृच्छ्राब्दादि चरेच्छक्त्याऽशक्तो गोऽर्घादिनाऽशठः।।२८।।**

मातुल+सखि+स्त्रीभुक् श्वा, औपपत्यतः कृमिः स्यात्। स्वैरिण्याः स्त्रिया अपि श्वादि योनिं गत्वा अलं व्यथन्ति।२५। इति संवादं आकर्ण्य त्रिविक्रमः गुरुं प्राह, ज्ञानात् वा अज्ञानता जातं पापं कथं प्रणश्यति?२६। श्रीगुरुः उवाच। 'पश्चात्तापेन, पुनः प्रायश्चित्तादिभिः संशुद्धिः। सदसि स्वं पापं उच्चार्य, ब्रह्मदंडं च निधाय,।२७। सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृत+पाप+अनुसारतः शक्त्या चरेत्। अशक्तः गो-अर्घ-आदिना अशठः (चरेत्)।'२८।

मामाच्या किंवा मित्राच्या स्त्रीशी संभोग केल्यास कुत्र्याचा जन्म तसेच व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना कृमीचा जन्म मिळतो. स्वैराचारी स्त्रियासुद्धा श्वानादि योनीत जाऊन अतिशय कष्ट भोगतात.२५.

**प्रायश्चित्त -** हा संवाद ऐकून त्रिविक्रम मुनींनी श्रीगुरूंना विचारले, कळत वा न कळत घडलेल्या पापाचा नाश कसा करतां येईल?

श्रीगुरू सांगत आहेत. पश्चात्तापाने तसेच प्रायश्चित्ताने उत्तम प्रकारे पापाची शुद्धी होते. विद्वान् ब्राह्मणांच्या सभेत प्रथम गाय, बैल किंवा द्रव्यस्वरूपांत ब्रह्मदंड द्यावा आणि आपल्या पापाचा उच्चार करावा.२७. नंतर सभेच्या आज्ञेने क्षौरपूर्वक केलेल्या पापाच्या तारतम्याने शक्त्यनुसार अब्दादि (वर्षभर आचरायचे) कृच्छ्रे अनुष्ठावीत. तेवढे अनुष्ठान करण्याची शक्ती नसेल तर गोदान करावे अथवा गाईच्या मूल्याएवढे द्रव्य दान करावे. किंवा निष्क (साडेबारा ग्रॅम) वा शक्य तेवढे सोने निष्कपटपणे द्यावे.२८.

**स्वल्पं तीर्थे दशस्नानाद् द्विशतास्वायमैरघम् । स्वर्णदानात्प्रणश्येत सद्गुरोर्दर्शनान्महत् ।।२९।।**
**त्र्यहं दिवा त्र्यहं सायं त्र्यहमद्यादयाचितम् । नाद्यात् त्र्यहं कायकृच्छ्रोऽयुतगायत्रिकाजपात् ।।३०।।**
**सहस्रहवनाद्वापि द्वादशद्विजभोजनात् । गोदानाच्छक्तितोऽर्घाद्वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति ।।३१।।**
**द्वादशद्युः पञ्चदश-ग्रासा भोज्याः सदा निशि । मासाच्छुद्धिः स्वल्पभुज्या क्षीराज्याद्याशनैश्च वा ।।३२।।**

स्वल्पं अघं तीर्थे दश+स्नानात्, द्विशत+असुयामैः (वा) प्रणश्येत्। महत् (पापं) स्वर्णदानात् सद्गुरोः दर्शनात् (वा) प्रणश्येत।२९। त्रि+अहं दिवा त्र्यहं सायं, त्र्यहं अयाचितं अद्यात्, त्र्यहं न अद्यात् कायकृच्छ्रः, अयुत+गायत्री+जपात् (वा)।३०। सहस्र+हवनात् वा, द्वादश द्विज+भोजनात्, गोदानात्, शक्तितः अर्घात् वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति।३१। द्वादश+द्युः पञ्चदश ग्रासाः भोज्याः, सदा निशि स्वल्पभुज्या मासात् शुद्धिः, क्षीर+आज्य+अशनैः च वा (शुद्धिः)।३२।

लहानसहान पापे तीर्थांत दहा स्नाने (प्रत्येक स्नानानंतर केस वाळेपर्यंत थांबून) केल्याने तसेच दोनशे प्राणायामांनी नष्ट होतात. महापाप सुवर्णदानाने किंवा सद्गुरूंच्या दर्शनाने नाश पावते.२९.

**प्राजापत्य कृच्छ्र -** तीन दिवस दिवसा, तीन दिवस रात्री आणि तीन दिवस अयाचित भोजन करून तीन दिवस उपोषण करावे म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होते; किंवा याचा पर्याय म्हणून दहा हजार गायत्रीचा जप करावा;३०. किंवा गायत्री मंत्राचे हजार तुपाच्या आहुतींचे हवन करावे; किंवा बारा ब्राह्मणांना भोजन द्यावे; तसे गाईचे किंवा शक्त्यनुसार तितक्या मूल्याचे दान करावे म्हणजेही प्राजापत्य कृच्छ्र संपन्न होते.३१. पंधरा घास दिवसा आणि बारा घास रात्री अन्न घ्यावे; किंवा महिनाभर रात्री अल्प (अंजुळी) आहार करावा; किंवा दूध-तुपावर राहावे म्हणजे शुद्धी होते.३२.

**बिल्वाश्वत्थाब्जदर्भाम्बु-पानात् तीर्थाटनादपि । वाराणसीस्नानमात्राल्-लीयन्ते पापकोटयः ।।३३।।**
**अन्यतीर्थे त्वनुष्ठानाद्रामेश्वरसमीपतः । अब्धिस्नानाद्ब्रह्महत्या-कृतघ्नाद्यघसंहृतिः ।।३४।।**
**लक्षसंख्याकगायत्री-जपान्मद्यपसंशुचिः । कोट्या ब्रह्मघ्नोऽष्टलक्षैर्गुरुतल्पगतस्य च ।।३५।।**
**सप्तलक्षात्स्वर्णहर्तुः पावमानीभिरप्युत । इन्द्रं मित्रं शुनःशेप-सूक्तं पौरुषशान्तिके ।।३६।।**
**त्रिसुपर्णं नाचिकेतमघमर्षणवैष्णवे । मासमात्रं जपेत्स्वल्पे षण्मासं च महत्यघे ।।३७।।**

बिल्व+अश्वत्थ+अब्ज+दर्भ+अंबु+पानात् तीर्थ+अटनात् अपि, वाराणसी+स्नान+मात्रात् पापकोटयः लीयन्ते।३३। अन्यतीर्थे तु अनुष्ठानात्। रामेश्वर+समीपतः अब्धि+स्नानात् ब्रह्महत्या+कृतघ्नादि अघ+संहृतिः।३४। लक्ष+संख्याक+गायत्री+जपात् मद्यप+संशुचिः। कोट्या ब्रह्मघ्नः, अष्टलक्षैः गुरु+तल्प+गतस्य च (शुद्धिः)।३५। सप्तलक्षात् स्वर्णहर्तुः (शुचिः)। पावमानीभिः अपि उत 'इंद्रं मित्रं', 'शुनःशेप', पौरुष+शांतिके।३६। त्रिसुपर्णं, नाचिकेतं, अघमर्षण+वैष्णवे, स्वल्पे (अघे) मासमात्रं जपेत्। महति अघे च षण्मासं जपेत्। ३७।

बेल, पिंपळ, कमळ यांच्या पानांनी किंवा कुशोदकाचे पाणी रोज घेऊन उपवास केल्याने पर्णकृच्छ्र होते. तसेच तीर्थयात्रांनी आणि काशीला गंगास्नानाने पापांच्या कोटी लयाला जातात.३३. अन्य तीर्थांत मात्र अनुष्ठानानेच पापनाश होतो. रामेश्वरासन्निध समुद्रस्नान केल्याने ब्रह्महत्या, कृतघ्नता इत्यादि पापांचा नाश होतो.३४.

**वेदमंत्रांनी शुद्धी -** एक लाख गायत्रीमंत्राचा जप केल्याने मद्यपानाचे पाप जाते. एक कोटी जपाने ब्रह्महत्येपासून, आठ लाखांनी गुरुतल्पगमनाच्या पापाची शुद्धी होते. (गायत्रीच्या) सात लाख जपाने सुवर्णचोरीच्या पापाची शुद्धी होते. सर्व पवमान सूक्ताच्या (*'स्वाधिष्ठया'*पासून *'क्षीरं सर्पिर्मधूदकं'* पठणाने शुद्धी आहे. किंवा 'इंद्रं मित्रं' या एका मंत्राचा जप करावा. तसेच *'शुनःशेप'*सूक्त, पुरुषसूक्त किंवा शांतिसूक्त (*'शं न इंद्राग्नि'* ह्या पंधारा ऋचा) हे पाठ करावेत.३६. नारायणीय उपनिषदांतील त्रिसुपर्ण (भोजनाच्या आरंभी म्हटले जाणारे), कठ उपनिषत्, अघमर्षणाचे मंत्र किंवा *'अतो देवा'* इत्यादि विष्णुमंत्र लहानसहान पापांच्या परिमार्जनासाठी महिनाभर जपावेत. मोठ्या पापासाठी सहा महिने जप करावा.३७.

**चान्द्रायणं चरेद्ग्रासानेकैकं वर्धयेत्सिते । पक्षेऽन्यके ह्रासयेत्तैः शुचिगव्याशनेन च ।।३८।।**
**गोमूत्रं गोमयं क्षीरं दध्याज्यं सकुशोदकम् । मिलित्वा मन्त्रवद्धुत्वा पिबेत्सर्वाघशान्तये ।।३९।।**
**उभौ समं ह्यनन्तर-कृताघेणापि दम्पती । लिप्यते पापिसंसर्गी सोऽपि पापी भवेत्समः ।।४०।।**
**प्रायश्चित्तानि चीर्णानि दुष्टं हरिपराङ्मुखम् । नदीव सौरभाण्डं न निष्पुनन्ति कथञ्चन ।।४१।।**

चान्द्रायणं चरेत्। सिते पक्षे एक+एकं ग्रासान् वर्धयेत्। अन्यके ऱ्हासयेत्। तैः शुद्धिः। (पंच)गव्य अशनेन च।३८। गोमूत्रं, गोमयं, क्षीरं, दधि, आज्यं सकुश+उदकं मिलित्वा मन्त्रवत् हुत्वा सर्वाघ+शान्तये पिबेत्।३९। दुष्टं हरि+पराङ्+मुखं चीर्णानि प्रायश्चित्तानि न निष्पुनन्ति। नदी सौरभाण्डं इव।४०। अनन्तर+कृत+अघेण उभौ अपि दम्पती समं लिप्यते। पापी+संसर्गी सः अपि समः पापी भवेत्।४१।

**चांद्रायण** व्रतानेसुद्धां शुद्धी होते. शुक्ल पक्षाच्या प्रतिपदेला एक घास भोजन करायचे आणि मग चंद्राच्या कलेनुसार एक एक घास वाढवीत पौर्णिमेला पंधरा घासाचे भोजन करायचे. एक घास कोंबडीच्या किंवा मोराच्या अंड्याएवढा किंवा ओल्या आंवळ्याएवढा असावा. कृष्ण पक्षात परत एक एक घास कमी करीत अमावस्येला पूर्ण उपोषण करायचे. याला यवमध्य चांद्रायण असे म्हणतात. याउलट पौर्णिमेला पंधरा घास घेऊन एक एक घास कमी करीत अमावास्येला उपोषण करून पुन्हा शुक्ल पक्षात एक एक घास वाढवीत जाणे याला पिपीलिकामध्य चांद्रायण असे नाव आहे. यांत पूर्ण महिन्यांत एकूण २४० घास घेतले जातात. याला पर्याय म्हणून कुणी रोज चार चार घासांचे जेवण दोन वेळा (शिशुचांद्रायण) किंवा आठ घास एक वेळा (यतिचांद्रायण) घेतात. पंचगव्यानेही शुद्धी होतेच ते पुढच्या श्लोकांत वर्णिले आहे.३८.

**पंचगव्य** गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप हे पांच (पंचगव्य) कुशजलांत मिसळून अभिमंत्रित करून प्याल्याने सर्व पापांची शांती होते.३९. पती-पत्नीमध्ये एकाने पाप केले तरी दोघांनाही सारखाच दोष लागतो. तसेच पापी माणसाशी संसर्ग ठेवणाराही एका वर्षांत तेवढाच पापी होतो.४०. बंद तोंडाची दारूची बाटली जशी नदीत कितीही बुचकळली तर शुद्ध होत नाही, त्याचप्रमाणे अश्रद्ध, ईश्वरपराङ्मुख आणि भक्तिहीन दुष्टाने कितीही प्रायश्चित्ते आचरली तरी तो शुद्ध होत नाही.४१.

**इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा पतितं प्राह सद्गुरुः । प्राङ्मातापितृसंत्यागाल्लब्धा चण्डालताऽत्र ते ।।४२।।**
**मासमात्रं नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि । प्राहान्त्यजो योजय मां त्वद्दृक्पूतं द्विजातिषु ।।४३।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भूत्वापि पतिताद्वृद्धो देहस्तेऽसंस्कृतोऽशुचिः । वदन्ति पतितं न त्वामन्यत्प्रोक्तं कथं त्वया ।।४४।।**
**विश्वामित्रः पुरा क्षत्रो देवर्षित्वं तपोबलात् । देवान्ययाचे प्रोक्तं तैर्वसिष्ठात्स्वीकुरुष्व तत् ।।४५।।**

इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा सद्गुरुः पतितं प्राह। 'प्राक् माता+पितृ+संत्यागात् ते अत्र चण्डालता।४२। मासमात्र नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि।' अन्त्यजः प्राह, 'त्वत्+दृक्+पूतं मां द्विजातिषु योजय।'४३। श्रीगुरुः उवाच। 'पतितात् भूत्वा वृद्धः अपि ते देहः असंस्कृतः। त्वां पतितं अशुचिः वदन्ति। त्वया अन्यत् कथं प्रोक्तम्?'४४। पुरा क्षत्रः विश्वामित्रः तपो+बलात् देवान् देवर्षित्वं ययाचे। तैः प्रोक्तं 'तत् वसिष्ठात् स्वीकुरुष्व।'४५।

हे सर्व त्रिविक्रम स्वामींना सांगून समोरच्या चांडालाला सद्गुरू म्हणाले, 'पूर्वी मागील सातव्या जन्मांत तू आपल्या आई-वडिलांना टाकून दिल्याने ह्या जन्मांत तुला चांडाल योनी आली आहे.४२. एक महिनाभर नदीवर स्नान केल्याने तू शुद्ध होऊन मृत्यूनंतर ब्राह्मण जन्म पावशील.' त्यावर तो अंत्यज म्हणाला, 'आपल्या दृष्टिपाताने मी पवित्र झालो आहे. आतां मला ब्राह्मणांत मिळवून घ्या!'४३. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंत्यजापासून झालेल्या आणि त्याच ठिकाणी वाढलेल्या तुझ्या ह्या देहावर कसलेही संस्कार झाले नाहीत व होऊ शकत नाहीत. यासाठी तुला अस्पृश्य मानतात. तू हे भलतेच काय बोलतोस?'४४. 'पुरातन काळी क्षत्रिय कुळांत जन्म घेतलेल्या विश्वामित्राने आपल्या तपोबलाच्या आधारे देवांना आपल्याला ऋषित्व (ब्राह्मणत्व) देण्याची मागणी केली. देवांनी त्याला ते वसिष्ठ ऋषीकडून मान्य करून घ्यायला सांगितले.४५.

**वसिष्ठेनापि हीनत्वान्न दत्तं तत्सुतान्छतम् । हत्वा तं हन्तुकामोऽभूच्छङ्कितो ब्रह्महत्यया ।।४६।।**
**तदाज्ञया तपस्तप्तं तत्तु मेनकया हृतम् । विश्वामित्रः पुनस्तप्त्वा दग्धाङ्गोऽभूदृषीश्वरः ।।४७।।**
**तस्माद्भवान्तरे तेऽस्तु ब्रह्मत्वं गच्छ तेऽस्तु शम् ।।४८।।**

**।। पतित उवाच ।।**

**जाते स्वर्णेऽयसः पश्चात्कुतोऽयस्तद्वदप्यहम् ।।४९।।**

वसिष्ठेन अपि हीनत्वात् (तं देवर्षित्वं) न दत्तम्। (विश्वामित्रः) तत् सुतान् शतं हत्वा तं हन्तु+कामः अभूत्। ब्रह्महत्यया शङ्कितः।४६। तत् आज्ञया तपः तप्तम्। तत् तु मेनकया हृतम्। विश्वामित्रः पुनः तप्त्वा दग्ध+अङ्गः ऋषि+ईश्वरः अभूत्।४७। 'तस्मात् भव+अंतरे ते ब्रह्मत्वं अस्तु। गच्छ ते शं अस्तु।'४८। पतित उवाच। 'अयसः स्वर्णे जाते पश्चात् कुतः अयसः? तत् वत् अहं अपि।'४९।

वसिष्ठ ऋषींनीही त्याचा जन्म हीनकुळांत झाल्याने त्याला देवर्षित्व दिले नाही. तेव्हा विश्वामित्राने क्रोधाने त्याचे शंभर पुत्र ठार मारले. तो वसिष्ठांनाही मारायला उद्युक्त झाला; पण ब्रह्महत्येचा दोष लागेल या आशंकेने थांबला.४६. त्याच वसिष्ठांच्या आज्ञेने त्याने आणखी तप केले. पण इंद्राने पाठविलेल्या मेनकेने त्याचे हरण केले. विश्वामित्राने पुनः तसेच तप शरीर जळेपर्यंत केले आणि नूतन शरीर धारण करून तो ब्रह्म ऋषीची पदवी पावला.४७. एवढ्यासाठी या जन्मात नाही तरी पुढच्या जन्मात तू ब्राह्मण होशील. जा, तुझे कल्याण असो!४८. त्यावर पतित म्हणाला, 'एकदां लोखंडाचे सोन्यांत रूपांतर झाल्यावर ते पुन्हां लोखंड कसे होईल? त्याचप्रमाणे माझेही आहे. एकदा ब्राह्मण झाल्यावर मी परत चांडाल कसा होऊ?' ४९.

**तच्छुत्वा श्रीगुरुर्विप्र-भ्रान्त्या दूरात्स्त्रियं सुतान् । वारयन्तं वीक्ष्य शिष्यमाहामुं स्नापय द्रुतम् ।।५०।।**
**तदा लुब्धद्विजेनैष स्नापितः पतितः स्वकैः । सहागाद्विस्मृतप्राप्त-ज्ञानो हीनो निजालयम् ।।५१।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**पतितोऽपि कृपादृष्ट्या पावितः स्नानमात्रतः । कथं स पूर्ववज्जातो भगवन्छिन्धि संशयम् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**क्षिप्तं भस्मार्पितं ज्ञानं विनष्टं क्षालनात्तु तत् । इयान् भस्मप्रभावः प्राग्वामदेवो महामुनिः ।।५३।।**

तत् श्रुत्वा (तथा) विप्र+भ्रांत्या स्त्रियं, सुतान् दूरात् वारयन्तं (तं पतितं) वीक्ष्य श्रीगुरुः शिष्यं आह, 'अमुं द्रुतं स्नापय।'५०। तदा लुब्ध+द्विजेन एष पतितः स्नापितः। विस्मृत+प्राप्त+ज्ञानः हीनः स्वकैः सह निजालयं अगात्।५१। त्रिविक्रम उवाच। 'पतितः अपि कृपा+दृष्ट्या पावितः। सः स्नान+मात्रतः कथं पूर्व+वत् जातः? भगवन् संशयं छिन्धि।'५२। श्रीगुरुः उवाच। 'भस्म क्षिप्त्वा ज्ञानं अर्पितं तत् तु क्षालनात् विनष्टम्। इयान् भस्म+प्रभावः। प्राक् वामदेवः महामुनिः वने चचार।५३।

त्याचे ते बोलणे ऐकून व तो आपल्याला बोलावणाऱ्या पत्नी व मुलांना दुरूनच परतवत असलेला पाहून श्रीगुरू शिष्याला म्हणाले, 'याला लवकर आंघोळ घाला!'५०. मग एका लोभी ब्राह्मणाने त्या पतिताला स्नान घातले. तेव्हा त्या चांडालाला आधी झालेले ज्ञान नष्ट झाले व तो कुटुंबीयांसह आपल्या घरी गेला.५१. हे सर्व पाहत असलेल्या त्रिविक्रम स्वामींनी श्रीगुरूंना विचारले, 'आपल्या कृपादृष्टीच्या प्रभावाने पावन झालेला हा चांडाल केवळ स्नानानेच कसा पहिल्यासारखा झाला? भगवंता, आपण ह्या माझ्या शंकेचे समाधान करावे.'५२. श्रीगुरू म्हणाले, 'भस्म टाकून त्याला ज्ञान दिले. भस्म धुवून टाकल्याबरोबर ते नाहीसे झाले! हा सगळा भस्माचा प्रभाव आहे.' श्रौत असो वा स्मार्त असो, कोणतेही कर्म करतांना भस्म धारण करणे आवश्यकच असते. त्याची आवड निर्माण व्हावी म्हणून भस्ममाहात्म्याचे पूर्व इतिहासासहित वर्णन करीत आहेत. पूर्वीच्या काळी वेदांनी गौरविलेले वामदेव महर्षि,५३.

**वने चचार तं प्रात्तुमागतो ब्रह्मराक्षसः । स्पर्शमात्रात्प्रशान्तोऽभूज्ज्ञाताऽखिलनिजोद्भवः ।।५४।।**

**।। ब्रह्मराक्षस उवाच ।।**

**प्राक्श्रीमत्तोऽस्मि राट्कामी ब्राह्मणाद्यन्तजातिजाः । भुक्ताः श्रेष्ठाः स्त्रियोऽल्पाश्च सहैकैकामनन्तशः ।।५५।।**
**हठाद्दानादिनानीय भुक्ता मद्राष्ट्रसंस्थिताः । नरा राष्ट्रान्तरं जग्मुः सस्त्रीका दोषकातराः ।।५६।।**
**ततो रुग्णस्य मे राज्यमाक्रान्तं शत्रुभिस्ततः । कृच्छ्रात्प्रेत्य मया भुक्ता पितृभिः सह दुर्गतिः ।।५७।।**

तं प्रात्तुं ब्रह्मराक्षसः आगतः। (सः वामदेवस्य अङ्ग) स्पर्शात् प्रशांतो अखिल+निज+उद्भवः ज्ञाता अभूत्।'५४। ब्रह्मराक्षस उवाच। 'प्राक् श्रीमत्तः कामी राट् अस्मि। ब्राह्मण+आदि+अंत्य+जातिजाः श्रेष्ठाः अल्पाः च स्त्रियाः एक+एकाम् सह अनन्तशः भुक्ताः।५५। हठात् दानादिना आनीय भुक्ताः। मत्+राष्ट्र+संस्थिताः नराः दोष+कातराः सस्त्रीकाः राष्ट्र+अंतरं जग्मुः।५६। ततः मे रुग्णस्य राज्यं शत्रुभिः आक्रान्तम्। ततः कृच्छ्रात् प्रेत्य मया पितृभिः सह दुर्गतिः भुक्ता।५७।

एकदां गहन वनात संचार करीत असताना त्यांना खाण्यासाठी एक ब्रह्मराक्षस त्यांच्यावर धांवून आला. पण त्यांचा अंगस्पर्श होतांच त्याचा सगळा त्वेष जाऊन तो एकदम शांत झाला. तसेच त्याला आपल्या सर्व पूर्वजन्मांची स्मृतीही आली.५४. ब्रह्मराक्षस वामदेवांना सांगूं लागला. 'पूर्वजन्मी मी संपत्तीने माजलेला कामासक्त असा राजा होतो. ब्राह्मणापासून अगदी हीनयातीत जन्मलेल्या, प्रौढ, अल्पवयीन, वयांतही न आलेल्या स्त्रियांचा मी भोग घेतला. एकदा भोगून झाल्यावर मग त्यांची विचारपूसही केली नाही.५५. पैशांनी वगैरे त्या आल्या नाहीत तर बलात्काराने मी धरून आणून त्यांचा उपभोग घेत असे. त्यामुळे माझ्या राज्यांतील लोक हा जातिसंकराचा दोष टाळण्यासाठी म्हणून आपापल्या स्त्रियांना घेऊन परराष्ट्रांत जाऊन राहिले.५६. पुढे मी व्याधिग्रस्त झालो असता शत्रूंनी माझे राज्य हिरावून घेतले. मला कष्टप्रद मरण आले. मृत्यूनंतर मला माझ्या पितरांसह नरकवास भोगावा लागला.'५७.

**प्रेतो व्याघ्रश्चाजगरः सालावृक उ सूकरः । शरठः श्वा क्रोष्टुमृगौ कुक्कुटः कपिचिल्लकौ ।।५८।।**
**नकुलः काक ऋक्षश्च कुक्कुटः खर ओतुकः । भेकः कूर्मो मत्स्य आखुर्घूको हस्तीह राक्षसः ।।५९।।**
**एता योनीर्मया भुक्ताः कृच्छ्रात्क्षुत्तृट्प्रपीडितः । त्वामत्तुमागमन् सद्यः शान्तो जातोऽस्म्यदः कथम् ।।६०।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**अङ्गे भस्मास्ति तत्स्पर्शाज्ज्ञानं जातं तवादितः । तन्माहात्म्यमिदं यत्तु सदा प्रीत्या शिवो दधौ ।।६१।।**
**पुरैको द्राविडे विप्र औपपत्ये हतो बहिः । त्यक्तस्तत्रैव भस्माक्त-श्वस्पर्शाद्भस्मभूषितः ।।६२।।**

'प्रेतः, व्याघ्रः, अजगरः, सालावृकः उ सूकरः, शरठः, श्वा, क्रोष्टु+मृगौ, कुक्कुटः, कपि+चिल्लकौ,।५८। नकुलः, काकः, ऋक्षः, च कुक्कुटः खरः, ओतुकः, भेकः, कूर्मः, मत्स्यः, आखुः, घूकः, हस्ती, इह राक्षसः।५९। एता योनीः मया कृच्छ्रात् भुक्ताः। सद्यः क्षुत्+तृट्+प्रपीडितः त्वां अत्तुं आगमन् शान्तः जातः अस्मि। अदः कथम्?'६०। वामदेव उवाच। 'अङ्गे भस्म अस्ति। तत्+स्पर्शात् तव आदितः ज्ञानं जातम्। इदं तत्+माहात्म्यं यत् तु शिवः सदा प्रीत्या दधौ।६१। पुरा द्राविडे एकः विप्रः औपपत्ये हतः बहिः त्यक्तः। तत्र एव भस्माक्त+श्व+स्पर्शात् (सः) भस्मभूषितः।६२।

पिशाच, वाघ, अजगर, खोकड, डुक्कर, सरडा, कुत्रा, कोल्हा, कोंबडा, वानर, घार,५८. मुंगूस, कावळा, अस्वल, रानकोंबडा, गाढव, मांजर, बेडूक, कासव, मासा, उंदीर, घुबड, हत्ती आणि शेवटी आत्तांचा हा ब्रह्मराक्षस,५९. इतक्या योनींत जन्मून मला कष्ट भोगावे लागले. तहान-भुकेने कासावीस होऊन आज मी तुम्हांला खाण्यासाठी धांवून आलो असता मी एकदम शांत झालो. हे असे कसे झाले?६०. वामदेव त्याला म्हणाले, 'माझ्या अंगावर जे भस्म आहे त्याच्या स्पर्शामुळे (तूं शांत होऊन) तुला सर्व पूर्वीचे ज्ञान झाले. त्या भस्माचेच हे माहात्म्य आहे जे साक्षात् भगवान् शंकर सदा प्रेमपूर्वक धारण करतात.६१. पूर्वी द्रविड देशामध्ये एक ब्राह्मण व्यभिचारावरून झालेल्या भांडणांत मारला गेला व त्याला गावाबाहेर टाकण्यांत आले. तिथे भस्माने माखलेल्या कुत्र्याच्या स्पर्शाने ते भस्म त्याच्या शरीराला लागले.६२.

**असूञ्जहौ तदा प्राप्तान्याम्यान्दूतान्निवार्य तम् । भस्मदग्धमलं शैवा दूता निन्युः शिवान्तिकम् ॥६३॥**

**॥ राक्षस उवाच ॥**

**एवं चेद्भस्ममाहात्म्यं तत्स्वीकर्तुं समुत्सहे । तन्निर्माणप्रकारं मे शंस धार्यं कथं च तत् ॥६४॥**
**प्राग्ब्रह्मभ्योऽर्पिता वार्ता वाप्याद्या निर्जलस्थले । रचितास्तत्फलं त्वेतत्पापान्ते तव दर्शनम् ॥६५॥**

**॥ वामदेव उवाच ॥**

**त्र्यक्षं सायुधपङ्क्तिहस्तमहिसत्सूत्रं शिवं श्वेतभं, पञ्चास्यं च कपर्दिनं स्मितमुखं वैय्याघ्रचर्माम्बरम् ।**
**चार्वम्बान्वितमिन्दुभालमु शिरोगङ्गं गणाद्यन्वितम्, स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमारमुनिराण्नत्वाऽब्रवीत्प्राञ्जलिः ॥६६॥**

असून् जहौ। तदा प्राप्तान् याम्यान् दूतान् निवार्य शैवाः दूताः तं भस्म+दग्ध+मलं शिव+अन्तिकं निन्युः।'६३। राक्षस उवाच। 'एवं भस्म+माहात्म्यं चेत् तत् स्वीकर्तुं समुत्सहे। तत्+निर्माण+प्रकारं, तत् च कथं धार्यं मे शंस।'६४। प्राक् ब्रह्मभ्यः वार्ता अर्पिता, निर्जल+स्थले वापी+आद्याः रचिताः। एतत् पाप+अन्ते तव दर्शनं तत्+फलम् (अस्ति)।'६५। वामदेव उवाच। 'त्रि+अक्षं स+आयुध+पंक्ति+हस्तं अहि+सत्+सूत्रं, श्वेतभं, पञ्च+आस्यं, कपर्दिनं च स्मित+मुखं, वैयाघ्र+चर्म+अम्बरं, चारु+अम्बा+अन्वितं, इन्दु+भालं उ शिरो+गङ्गं, गण+अन्वितं शिवं स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमार मुनि+राट् नत्वा प्राञ्जलिः अब्रवीत्।'६६।

भस्मामुळे त्याची पापे धुतली गेल्याने, त्याला न्यायला आलेल्या यमदूतांना परतवून शिवदूतांनी त्याला शिवलोकांत नेले.६३. ब्रह्मराक्षस म्हणाला, एवढं भस्माचे माहात्म्य ऐकून मलाही ते धारण करावे अशी स्फूर्ती होत आहे. ते कसे तयार करावे आणि कसे लावावे ते मला आपण सांगा.६४. पूर्वी मी ब्राह्मणांच्या उपजीविकेसाठी भूमी दान केली होती; तसेच पाणी नसलेल्या ठिकाणी विहिरी खणविल्या होत्या. पापाचा भोग सरल्यावर झालेले आपले दर्शन हे त्याचेच फळ आहे.६५. वामदेव सांगू लागले, 'त्रिनेत्र, आयुधे धारण केलेल्या दहा भुजा, नागाचे यज्ञोपवीत धारण केलेल्या शुभ्र धवल वर्णाच्या, पंचमुखी, कवड्यांनी सुशोभित, सुहास्यवदन, व्याघ्राजिन पांघरलेल्या, वामांकी त्रैलोक्यमोहिनी पार्वतीमातेला घेतलेल्या कपाळावर चंद्र मिरविणाऱ्या तसेच शिरी गंगा धारण केलेल्या, गणसमूहांनी वेष्टिलेल्या भगवान शिवांना प्रसन्नचित्त पाहून मुनिश्रेष्ठ सनतकुमार नमस्कार करून हात जोडून त्याना म्हणाले.६६.

**जयेश्वरानन्त हराज शंभो जगन्निदानाल्पकसाधनं नः ।**
**मुक्त्यै शिवोपादिश दुष्कराणि प्रोक्तानि सर्वाणि तु साधनानि ।।६७।।**

**।। शिव उवाच ।।**

**दर्शनात्परिहृत्याघं भुक्त्वा शं विधिवद्धृतेः । भस्मनः पुरुषोऽह्नाय जीवन्मुक्तो भवत्यलम् ।।६८।।**
**यज्ञोत्थं वा करीषोत्थमग्निरित्यादिमन्त्रितम् । धार्यं त्र्यायुषमित्येतैरङ्गुलीभिः प्रतिस्थलम् ।।६९।।**
**त्रिपुण्ड्रा भ्रूसमा रेख्या वर्णादिस्मृतिपूर्वकम् । त्र्यर्णास्त्रिदेवास्त्रिगुणास्त्रिरात्मानस्त्रिशक्तयः ।।७०।।**

'हे हर! हे अज! हे अनंत! हे शंभो! हे जगन्निदान! नः मुक्त्यै अल्पक+साधनं उपादिश। हे शिव! सर्वाणि प्रोक्तानि साधनानि तु दुष्कराणि।'६७। शिव उवाच। 'दर्शनात् अघं परिहृत्य, विधिवत् धृतेः भस्मनः शं भुक्त्वा पुरुषः अह्नाय अलं जीवन्मुक्तः भविष्यति।६८। यज्ञ+उत्थं वा करीष+उत्थं 'अग्निः' इत्यादि मंत्रितं, 'त्र्यायुषं' इत्येतैः अङ्गुलीभिः प्रतिस्थलं धार्यम्।६९। वर्णादि+स्मृति+पूर्वकं भ्रूसमा त्रिपुंड्रा रेख्या। त्रि+अर्णाः, त्रि+देवाः, त्रि+गुणाः, त्रिः+आत्मनः, त्रि+शक्तयः,।७०।

'हर, अनंत, अज, शंभो, हे जगत्कारण, आम्हांला या जन्म-मरणरूपी संसारापासून मुक्त होण्यासाठी एखादे छोटे आणि सोपे असे साधन सांगा. आतांपर्यंत आपण उपदेशिलेली सर्व साधने खरोखर दुष्कर आहेत.६७.

**भस्ममाहात्म्य -** भगवान शंकर म्हणाले, 'भस्माच्या केवळ दर्शनाने पापांचा परिहार करून, ते विधिपूर्वक धारण केल्याने सुख भोगून पुरुषाला शीघ्रच जीवन्मुक्त करते. अधिक काय सांगावे?'६८. यज्ञापासून झालेले किंवा जाबालांनी सांगितलेल्या पद्धतीने वाळलेल्या शेण्या जाळून केलेले भस्म उत्तम होय. ते 'अग्निरिति भस्म..' इत्यादि मंत्राने अभिमंत्रावे आणि 'त्र्यायुषं' इत्यादि मंत्रांनी तीन बोटांनी कपाळादि ठिकाणांवर लावावे.६९. भिवईच्या रुंदीच्या तीन रेघा वर्णादींचे स्मरण करून ठिकठिकाणी लावाव्या. 'अ', 'उ', 'म' हे तीन वर्ण (अक्षरे), ब्रह्मा-विष्णू-महेश्वर ह्या तीन देवता, सत्त्व-रज-तम हे तीन गुण, विश्व-तैजस-प्राज्ञ हे तीन अभिमानी (आत्मे), इच्छा-द्रव्य-क्रिया,७०.

**त्रिछन्दसस्त्रिलोकास्त्रि-वेदास्त्रिषवणाः स्मृताः । सर्वाघहृत्सदा सर्वैर्धार्यं तद्विधिवन्नरैः ।।७१।।**
**भक्त्याज्ञेनापि तद्धार्यं तारकं नापरं ह्यतः । परस्त्रीगोनिन्दकोऽसन् क्षेत्रहृत्परपीडकः ।।७२।।**
**गृहदाही मृषावादी खलो वेदरसक्रयी । नीचाच्च दुष्प्रतिग्राही वृषलीविधवादिगः ।।७३।।**

त्रि+छंदसः, त्रिलोकाः, त्रि+वेदाः, त्रि+षवणाः स्मृताः। तत् सर्व+अघ+हृत् सर्वैः नरैः सदा विधिवत् धार्यम्।७१। अज्ञेन अपि तत् भक्त्या धार्यम्। अतः न अपरं तारकं (अस्ति) हि। (पर+स्त्री+गः, निन्दकः, क्षेत्र+हृत्ट पर+पीडकः।७२। (परस्त्रीगः, निन्दकः, असन्, क्षेत्रहृत्, परपीडकः), गृहदाही, मृषावादी, खलः, वेद+रस+क्रयी, नीचात् दुः+प्रतिग्राही, वृषली+विधवा+आदि+गः,।७३।

ह्या तीन शक्ती, गायत्री-उष्णिक्-अनुष्टुभ हे तीन छंद, भूः-भुवः-स्वः हे तीन लोक, ऋग्वेद-यजुर्वेद-सामवेद हे तीन वेद आणि प्रातः-माध्याह्न-सायं हे तीन सवन आहेत. सर्व पापहर अशा भस्माचे सर्व वर्णाच्या तसेच सर्व आश्रमाच्या स्त्रीपुरुषांनी आणि विधवादींनीही - मनुष्यमात्रांनी, विधिपूर्वक धारण करावे.७१. अगदी अज्ञानी माणसानेही ते भक्तीपूर्वक लावावे; कारण ह्याच्याइतके तारक दुसरे साधनच नाही.७२.

**जाणून करणाऱ्याला अधिक फळ -** इतके आवर्जून सांगितल्यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो की केवळ भस्म लावण्याचेच एवढे पुण्य असेल तर मग ज्ञानाचे काय प्रयोजन! हिरडा खाल्ल्याने त्याचे ज्ञान असले वा नसले तरी विरेचन होतेच. त्याचे असे समाधान आहे की ज्याला ज्ञान असते त्याला अधिक लाभ होतो. पद्मरागादि मण्यांचा विक्रय करतांना भिल्लाला वगैरे जेवढे पैसे मिळतात त्याहून मण्यांचे ज्ञान असलेल्या सराफाला अधिक लाभ होतो हे आपण पाहतोच ना? छांदोग्यांत (१:१:१०) सांगितले आहे की ज्ञानपूर्वक, श्रद्धेने आणि ध्यानयोगाने केलेले कर्मच अधिक वीर्यशाली होते. जाणून कर्म करावे अशी श्रुतीही आहे. यासाठी जाणून - समजून केलेल्या कर्माचे फल उत्कृष्ट होते. हा नियम सर्वच कर्मांना लागूं आहे.

'परस्त्रीगामी, निन्दक, अधर्माचारी,जमीन लुबाडणारा, घराला आग लावणारा, खोटा आरोप करणारा, दुष्ट, वेद आणि रस (विष, मद्य आदि) यांचा विक्रय करणारा, हीनाकडून निषिद्ध दान घेणारा, कुमारिका किंवा विधवा स्त्रियांशी संग करणारा,७३.

**ज्ञानाज्ञानकृताऽघोपि मुक्तः स्याद्भस्मधारणात् । भस्मत्रिपुण्ड्ररुद्राक्षैः स्वः पूज्यो ना पुमर्थदैः ।।७४।।**
**सहस्रप्राक्परोत्पत्ति-दोषघ्नं व्याधिनाशनम् । तीर्थाप्लुतिजपाधिक्य-फलदं भस्मधारकम् ।।७५।।**
**स्वरादिलोकं नीत्वान्ते शैवे स्थापयति ध्रुवम् । सनत्कुमार सुलभं तारकं भस्मधारणम् ।।७६।।**
**एवं सनत्कुमारेश-संवादस्ते मयोदितः । तस्मात्त्वं परिधत्स्वाङ्गे भस्मेत्युक्त्वा ददौ मुनिः ।।७७।।**
**राक्षसोऽपि तदादाय भस्माङ्गे विधिवद्दधौ । तदैव राक्षसीं हित्वा तनुं मुक्तोऽभवत्क्षणात् ।।७८।।**

ज्ञान+अज्ञान+कृत+अघः अपि भस्मधारणात् मुक्तः स्यात्। पुं+अर्थदैः भस्म+त्रिपुण्ड्र+रुद्राक्षैः ना स्वः पूज्यः।७४। भस्म+धारकं सहस्र+प्राक्+पर+उत्पत्ति+दोष+घ्नं, व्याधि+नाशनं, तीर्थ+आप्लुति+जप+आधिक्य+फलदम्।७५। स्वः+आदि+लोके नीत्वा अन्ते शैवे ध्रुवं स्थापयति। (हे) सनत्कुमार भस्मधारणं सुलभं तारकं (च)।७६। एवं सनत्कुमार-ईश+संवादः ते मया उदितः। तस्मात् त्वं भस्म अङ्गे परिधत्।' इति उक्त्वा मुनिः (भस्म) ददौ।७७। 'राक्षसः अपि तत् भस्म आदाय विधिवत् अङ्गे दधौ। तदा एव (सः) राक्षसीं तनुं हित्वा क्षणात् मुक्तः अभवत्।७८।

जाणून किंवा अजाणतां पाप करणारे अंगाला भस्म लावल्याने त्या पापापासून मुक्त होतात. मानवाला पुरुषार्थांची (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) प्राप्ती करून देणाऱ्या भस्माचे त्रिपुंड्र तसेच रुद्राक्ष धारण करणारे मानव स्वर्गांतही पूज्य होतात.७४. भस्म धारण करणाऱ्याच्या पूर्वापर हजार जन्मांचे दोष नष्ट करून, तसेच त्याच्या व्याधींचाही नाश करून, तीर्थस्नान, जप इत्यादिकांपेक्षाही अधिक फळ भस्म देते.७५. स्वर्गादि लोकांत नेऊन शेवटी निरतिशयानंदरूप शैवलोकांत शाश्वत पुनरावृत्तीरहित ठेवून देणारे हे भस्मधारण तारक तर आहेच, पण तुला हवे तसे सुलभही आहे.७६. हे राक्षसा, असा हा सनत्कुमार आणि महादेव यांचा संवाद मी तुला सांगितला. तरी तूं हे भस्म स्वतःच्या शरीराला लावून घे.' असे म्हणून वामदेव मुनींनी त्याला आपल्याजवळचे भस्म दिले.७७. तेव्हां ब्रह्मराक्षसानेही ते भस्म घेऊन मंत्रासह अंगावर धारण केले. त्याच वेळी त्याने त्या राक्षस देहाचा त्याग केला आणि तत्क्षणी तो मुक्त झाला.७८.

**तदैवाप्तं विमानं स तेनागात्तत्क्षणाद्दिवम् ।**
**तस्मान्मुने भस्मशक्तिं ज्ञात्वाङ्गे धेहि मुच्यसे ।।७९।।**
**एवं गुरूक्तं ह्यभिगृह्य हृष्टो भक्त्योपसंगृह्य तमाज्ञयागात् ।**
**त्रिविक्रमोऽन्येऽपि हि तत्प्रमाणं मत्वोत्तमं चेरुरथो तथैव ।।८०।।**
**एवं क्रियाविपाकोऽयमीदृक्श्रुतिभयङ्करा ।**
**दण्डधृग्यातना तस्माच्छ्रेय एव सदाचरेत् ।।८१।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मविपाको नाम पञ्चदशोऽध्यायः ।।१५।।**

तदा एव विमानं आप्तम्। तेन सः तत् क्षणात् दिवं अगात्। तस्मात्, हे मुने, भस्म+शक्तिं ज्ञात्वा अङ्गे धेहि। मुच्यसे।'७९। एवं गुरु+उक्तं अभिगृह्य हृष्टः त्रिविक्रमः तं उपसंगृह्य आज्ञया अगात्। अन्ये अपि हि अथः तत् प्रमाणं उत्तमं मत्वा तथा एव चेरुः।८०। एवं क्रिया+विपाकः दण्ड+धृक्+यातना ईदृक् श्रुति+भयंकरा। तस्मात् श्रेय एव सदा आचरेत्।८१।

तात्काळ त्याच्यासाठी विमान आले आणि त्यात बसून तो सगेच स्वर्गाला गेला. ही कथा सांगून श्रीगुरू त्रिविक्रमांना म्हणाले, 'हे मुनिराज, हे भस्माचे सामर्थ्य जाणून ते नित्य शरीरावर धारण करा, म्हणजे मुक्त व्हाल!'७९. हा श्रीगुरूंचा उपदेश श्रवण करून संतोष पावलेल्या त्रिविक्रम स्वामींनी भक्तिपूर्वक त्यांना वंदन केले आणि त्यांची आज्ञा घेऊन कुमसीला गेले. तिथे जमलेले इतरही सद्गुरूंचा हा उपदेश श्रेष्ठतम प्रमाण मानून त्याप्रमाणेच आचार करू लागले.८०. असे हे कर्मविपाक आणि यमयातना ऐकायलासुद्धा भयंकर आहेत. मग भोगायला किती भयानक असतील? छांदोग्योपनिषदांत (५:१०:७) ह्याचे स्पष्ट दिग्दर्शन आहे. जे इथे भूलोकांत गलिच्छ आचरण करतात ते श्वान-सूकर-चांडालादि गलिच्छ योनींत जन्म घेतात. जे इथे चांगले आचरण करतात त्यांना तशाच चांगल्या योनीत (ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य) जन्म मिळतो. तरी श्रेयाचे म्हणजे सत्कर्माचेच आचरण मनुष्याने करावे. गरुडपुराणाच्या

प्रतिपादनानुसार (प्रेतकल्प, धर्मकांड ११:१२) स्वर्ग आणि मोक्ष या दोन्हींचे साधन असणारा हा मनुष्यजन्म लाभूनही जे त्यातले एकही साधत नाहीत ते स्वतः घोर वंचना करतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला दुसरा आणि प्रथमपासून पंधरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। षोडशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**नमस्ते ब्रूहि चरितं हरेरद्भुतकर्मणः । शृण्वतोऽपि न मे तृप्तिरमृतं पिबतो यथा ।।१।।**

नामधारक उवाच। (भो सिद्ध) ते नमः। अद्भुत+कर्मणा हरेः चरितं ब्रूहि। शृण्वतः अपि मे न तृप्तिः यथा अमृतं पिबतः।१।

श्रीगणेशाय नमः। *सोळाव्या अध्यायीं सतीला श्रीगुरु स्त्रियांचे धर्म उपदेशिती। सर्वेचि करुणाघन तियेच्या मृत पतीला जिवंत करिती।।१।।*

**श्रेय आणि प्रेय** - मागील अध्यायाच्या शेवटी सदा श्रेयाचीच कास धरावी असे म्हटले आहे. हे श्रेय म्हणजे काय ते कठोपनिषदांत (१:२:१ -१:२:४) यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाच्या आरंभीच स्पष्ट केले आहे. श्रेय म्हणजे कल्याणाचा मार्ग. याउलट प्रेय म्हणजे ऐंद्रिय सुखाची वाट. विचारी माणूस प्रेयाच्या मागे न लागतो श्रेयाचा अंगीकार करतो. यांचे परिणाम परस्परविरोधी आहेत. श्रेयाची वाट चित्तशुद्धीद्वारा ज्ञानाकडे आणि अंतिम कल्याणाकडे जाते. ह्याला यमाने विद्या असे नाव दिले आहे. तर अविद्या अज्ञानांत रुतवणाऱ्या प्रेयाकडे नेते. ऐहिक आणि पारलौकिक विषयभोगांचे साधनभूत कर्म म्हणजे अविद्या; तर निरतिशय आनंदाचा लाभ करून देणारी विद्या म्हणजे ज्ञान. ह्या ज्ञानाचे स्वरूप आपण ज्ञानकांडात पाहिले आहे. मात्र हे ज्ञान विषयवासनांनी कलुषित चित्तांत सहसा स्फुरत नाही. त्या चित्ताच्या शुद्धीसाठी शास्त्रविहित नित्य आणि नैमित्तिक कर्म निष्काम बुद्धीने करणे आवश्यक आहे. त्या कर्माचे निरूपण पुढे तीन अध्यायांत केले आहे. त्यापूर्वी दोन अध्यायांत स्त्रियांचे धर्म निरूपिले आहेत.

नामधारकांनी सिद्धमुनींना नमस्कार करून विनंति केली की, 'अद्भुत चमत्कारांनी भरलेले श्रीगुरूंचे चरित्र आपण मला पुढे सांगा. ते कितीही ऐकले तरी माझे मन तृप्त होत नाही. जसे अमृत पिणाऱ्याला ते अधिकाधिक हवेच असते तसे!'१.

### ।। सिद्ध उवाच ।।

**सत्पृष्टं वत्स धन्योऽसि भवाब्धिर्लीलया जितः । चित्तं ते चरितैर्विद्धं हरेस्तेनास्मि तोषितः ।।२।।**
**को ब्रूयाद्भगवल्लीलां कति चित्राणि वच्मि ते । मूको ब्रूते प्रेक्षतेऽन्धो मृतो जीवति यद्दृशा ।।३।।**
**शृण्वेको माहुरे विप्रो गोपीनाथो धनी मृताः । तत्पुत्रा बहवोऽथैको जीवितो दत्तसेवया ।।४।।**
**दत्तप्रसादाच्चिरजीवितं सुतं नाम्नाकरोद्दत्तमिति द्विजातिजः ।**
**कान्तः सुलक्ष्मा मतिमान्सुसात्त्विकः पित्रोर्मृतार्भाकविनाश्यवर्धत ।।५।।**

सिद्ध उवाच। '(हे) वत्स, सत् पृष्टम्। धन्यः असि। भव+अब्धिः लीलया जितः। ते चित्तं हरेः चरितैः विद्धं तेन तोषितः अस्मि।२। भगवत्+लीलां कः ब्रूयात्? कति चित्राणि ते वच्मि। यत् दृशा मूकः ब्रूते, अन्धः प्रेक्षते, मृतः जीवति।३। शृणु। माहुरे एको धनी विप्रः गोपीनाथः। बहवः तत्+पुत्राः मृताः। अथ एकः दत्त+सेवया जीवितः।'४। दत्त+प्रसादात् चिर+जीवितं सुतं द्विजातिजः नाम्ना दत्त इति अकरोत्। कान्तः सुलक्ष्मः मति+मान् सुसात्त्विकः पित्रोः मृत+अर्भ+अक+विनाशी अवर्धत।५।

सिद्ध म्हणाले, 'वा! उत्तम प्रश्न विचारलास. यमाने जसे सोन्याची साखळी असलेल्या प्रेयाला सोडून श्रेयाची कांस धरल्याबद्दल नचिकेत्याचे अभिनंदन केले तसेच तुझे करायला हवे. तू खरेच धन्य आहेस! श्रवणभक्तीचा आदर करून तू हा दुस्तर जन्ममरणरूपी संसार लीलया जिंकला आहेस. श्रीगुरूंच्या चरित्राने तुझ्या मनाचा वेध घेतला आहे हे पाहून मला खूप आनंद वाटतो.२. भगवंताच्या लीला पूर्णतया कोण बरे सांगू शकेल? कुणीच नाही. कांही आश्चर्यकारक घटना मी तुला सांगतो. त्या श्रीगुरूंच्या केवळ कृपादृष्टीनेच मुका बोलू लागतो, आंधळा पाहू लागतो, एवढेच काय मेलेलासुद्धा जिवंत होतो.'३. तर ऐक. माहूर गांवी एक गोपीनाथ नावाचा धनाढ्य ब्राह्मण होता. त्याचे बरेच पुत्र लहानपणीच मरण पावले. मग श्रीदत्तप्रभूंच्या उपासनेने त्याचा एक मुलगा जगला.४. दत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने जगलेल्या त्या मुलाचे नाव ब्राह्मणानी 'दत्त' असेच ठेवले. तो सुंदर, तेजस्वी, सुलक्षणी, बुद्धिमान मुलगा मातापितरांचे आधीच्या मुलांच्या मृत्यूचे दुःख हलके करीत त्याच्या घरी वाढू लागला.५.

**सुसंस्कृतस्यास्य विधेः सुरूपिणी लब्धा वधूर्धीगुणशीलशालिनी ।**
**रतिः स्मरस्येव परस्परोत्थितमासीत्तयोः प्रेम रथाङ्गनामवत् ।।६।।**
**सरूपौ सुरूपौ स्वयोर्मन्यमानौ वियोगं कुयोगं क्षणं धर्मदक्षौ ।**
**उभौ तौ स्मरन्तौ सदाऽन्योऽन्यभद्रं न तन्द्रा न निद्रा पतिप्रेम्णि साध्व्याः ।।७।।**

अस्य सुसंस्कृतस्य विधेः सुरूपिणी धी+गुण+शालिनी वधूः लब्धा। तयोः रति+स्मरस्य इव परस्पर+उत्थितं प्रेम रथांगनामवत् आसीत्।६। तौ उभौ सरूपौ सुरूपौ स्वयोः वियोगं कुयोगं मन्यमानौ, धर्मदक्षौ, सदा अन्यः+अन्य+भद्रं स्मरन्तौ। साध्व्याः पति+प्रेम्णि न तन्द्रा न निद्रा (आसीत्)।७।

यथाकाल त्याचे मौंजीबंधनादि संस्कार झाले. त्याच्या सुदैवाने त्या सुंदर, बुद्धिमती आणि गुणवान् अशी पत्नीही लाभली. त्या दंपतीमध्ये रती आणि मदन यांच्यासारखे प्रेम निर्माण झाले आणि ते चक्रवाक पक्ष्यांच्या प्रेमाप्रमाणे दृढावले.६. ते दोघे पतिपत्नी सुंदर आणि परस्परांना अनुरूप असे होते. एकमेकांचा किंचितही वियोग त्यांना सहन होत नसे. धर्माचरणांत ते उभयतां दक्ष होते आणि एकमेकांचे हित जिह्वाळ्याने जपत होते. त्या साध्वीला तर पतीच्या प्रेमापुढे न झोप, ना थकवा येत असे. इथे **सरूपौ** शब्दाचा अर्थ सारख्या रूपाचे असा घेतला तर याज्ञवल्क्यस्मृतीतल्या विवाहप्रकरणांतील(५२) 'वधू वयाने आणि अंगाने वरापेक्षा लहान (*यवीयसी*) असावी' या वचनाचा विरोध होतो. म्हणून सरूपौचा अर्थ अनुरूप असाच होतो.७.

**लेपोऽत्युष्ण इवानिलोऽनलसमः शीतांशुरुष्णांशुवच्छय्या वृश्चिकवत्सुमस्रगहिवद्भूषाः समाः कण्टकैः ।**
**वाङ्माधुर्यमपि प्रदीपनसदृक्स्वाद्वन्नमप्युत्कटु प्रेष्ठे त्वन्तरिते क्षणं दृढतरां साध्व्या अभूत्सर्वदा ।।८।।**
**एवं सतोश्चापरिहार्यशोषवान् भर्ता सुसाम्यासहनाद्विधेरभूत् ।**
**क्षीणोऽरुचिः श्वासकफार्दितोऽनिशं दुःखोझ्झितस्वापभुजिः सुमन्दवाक् ।।९।।**

प्रेष्ठे क्षणं अन्तरिते तु साध्व्या लेपः अति+उष्णः, अनिलः अनलसमः, शीत+अंशु उष्ण+अंशुवत्, शय्या वृश्चिकवत्, भूषाः कण्टकैः समाः, वाक्+माधुर्यं अपि प्रदीपनसदृक्, स्वादु+अन्नं अपि उत्कटु सर्वदा अभूत्। ८। एवं सतोः विधेः सुसाम्य+असहनात् भर्ता अपरिहार्य+शोषवान् अभूत्। क्षीणः अरुचिः अनिशं श्वास+कफ+अर्दितः दुःख+उझ्झित+स्वाप+भुजिः, सुमन्द+वाक् (अभूत्)।९।

पतीच्या क्षणभरही विरहाने त्या साध्वीला गार लेपसुद्धा पोळत असे; शीतल वायूसुद्धा अग्निसारखा दाहक वाटे; चंद्राच्या चांदण्याचेही चटके बसत; मृदू शय्याही विंचवासारखी दंश करीत असे; अलंकार काट्यासारखे टोचत असत; मधुर भाषणसुद्धा तिच्या चित्ताचा क्षोभ करी; एवढेच काय, चविष्ट अन्नही अति तिखट लागे.८. असा त्या दंपतीचा सुखाचा संसार जणू दैवाला पाहवला नाही. पतीला असाध्य असा क्षय रोग झाला. तो अत्यंत क्षीण झाला, सतत श्वास आणि दमा यांनी बेजार झाला. या दुःखामुळे त्याची झोप आणि आहार अत्यंत कमी झाले.९.

**भुङ्क्ते यथान्नं स सती तथान्नं शेतेऽपि यावत्स सती तु तावत् ।**
**कृशोऽपि यद्वत्स सती तु तद्वत् छायापरेवास्य पतिव्रताऽभूत् ।।१०।।**
**वैद्योऽन्तिके तस्य कुगन्धशङ्कया न याति साध्वी सुमना न तं जहौ ।**
**भेजे पतिं स्नानसुगन्धिलेपनैः पादाङ्गसंवाहनभेषजार्पणैः ।।११।।**

सः यथा अन्नं भुङ्क्ते, तथा सती अन्नं (भुङ्क्ते)। (सः) यावत् शेते सती तु तावत् (शेते)। यद्वत् सः कृशः सती तु तद्वत् (कृशा)। पतिव्रता अस्य अपरा छाया अभूत्।१०। वैद्यः कुगंध+शंकया तस्य अंतिके न याति। सुमना साध्वी तं न जहौ। पतिं स्नान+सुगंधि+लेपनैः पाद+अङ्ग+संवाहन+भेषज+अर्पणैः भेजे।११।

**क्षयाची लक्षणे -** इथे श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत चरकसंहितेतील (निदानस्थान ६:१५-१७) क्षयाच्या अकरा लक्षणांचा निर्देश केला आहे. डोके जड पडणे, दम लागणे, खोकला, स्वर कांपरा होणे, कफ पडणे, रक्त पडणे, कुशीच्या बरगड्या, खांदे व फऱ्याचे हाड यांच्या वेदना, ज्वर, अतिसार आणि अन्न गोड न लागणे. अशक्त, क्षीण, रक्त आणि स्नायू कमी झालेला रोगी. क्षयाची लक्षणे सौम्य असली किंवा धोकाजनक नसली तरी तो अरिष्टकारीच मानावा. औषधोपचाराचा विशेष प्रभाव पडणार नाही असे तिथेच सांगितले आहे. यासाठी अपरिहार्य क्षय असे म्हटले आहे.

अशा स्थितीत त्या पतिव्रतेने केलेल्या पतीचे मार्मिक वर्णन श्रीस्वामिमहाराजांनी केले आहे. तो जेवढे अन्न घेत असे तेवढेच ती सती घेई. त्याला जितका वेळ झोप येई तितकाच वेळ तीही झोपत असे. तो जितका रोड झाला तितकीच ती सतीही रोडावली. एकूण काय तर ती साध्वी त्याची जणू दुसरी सावलीच होऊन गेली!१०. त्याच्या शरीराच्या दुर्गंधीमुळे वैद्यही त्याच्याजवळ जाण्याचे टाळू लागले. पण त्या थोर मनाच्या सतीने त्याला सोडले नाही. त्याला स्नान घालून त्याच्या शरीरावर सुगंधी लेप लावू लागली. त्याचे पाय, अंग चुरून देऊ लागली. त्याला वेळच्या वेळी औषध देत असे.११.

**शान्त्यार्चनैर्होमजपैश्च भेषजैर्दानैर्न यक्ष्मा किमपि व्यहीयत ।**
**श्यामामुखेन्दुं परिपूर्णमुद्ग्रसन्मन्दस्मितज्योत्स्नमभूत्परो ग्रहः ॥१२॥**

अर्चनैः, होम+जपैः, भेषजैः, दानैः, शान्त्या च यक्ष्मा किं अपि न व्यहीयत्। मन्द+स्मित+ज्योत्स्नं श्यामा+मुख+इन्दुं परिपूर्णं उद्ग्रसन् (यक्ष्मा) परः ग्रहः अभूत्।१२।

*'पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण बाधते। तच्छान्तिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः'* या मनुस्मृतीच्या वचनानुसार पूर्वजन्मी केलेल्या पापापासून उद्भवलेल्या या क्षयरोगाच्या उपशमासाठी देवपूजा, होम, जप, औषधी आणि दान हे उपाय करण्यात आले. पण तो रोग मुळीच हटला नाही. त्याने त्या श्यामेच्या मुखरूपी पूर्णचंद्राची ज्योत्स्नाच असलेले तिचे मंदस्मित राहूप्रमाणे पूर्णतः ग्रासून टाकले. पतीला झालेल्या क्षयरोगाने तिचे मुख म्लान झाले हे उपमालंकाराने सांगितले आहे. **श्यामा** या शब्दाचे दोन अर्थ टीकेत दिले आहे. सोळा वर्षांची बाला आणि उष्णकालांत शीत असणारी आणि शीतकालांत उष्ण असणारी युवती.१२.

इथे अशी एक शंका उपस्थित केली आहे की बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार **क्रियमाण कर्माचे फल** जन्मांतराने मिळते. तेव्हा व्याधीच्या उपशमासाठी केलेल्या देवपूजादि कर्मांचा सध्याच्या जन्मात कसा उपयोग होईल? त्याचे समाधान असे आहे की अत्यंत तीव्र पापाचे किंवा पुण्याचेही फळ ह्याच जन्मात भोगावे लागते. त्यानुसार ह्या जन्मात केलेल्या जपहोमादि कर्मांनी पूर्वजन्माच्या कर्माचा उपशम होऊन आरोग्याचा लाभ होऊ शकतो.

**द्विजं रुजार्तं च तथाविधां वधूं तयोर्न शेकुः पितरौ निरीक्षितुम् ।**
**निवारिता तैरपि सा पतिव्रता न तं जहावर्यमणं प्रभा यथा ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्राग्वैरतः कष्टमिदं मयार्पितं धृत्या पितः सात्त्विकयाम्ब जीवितुम् ।**
**साध्वर्हथस्ते सति पूर्ववैर्यहं तन्मां विहायाशु पितुर्गृहं व्रज ।।१४।।**

रुजा+आर्तं द्विजं च तथाविधां वधूं तयोः पितरौ निरीक्षितुं न शेकुः। तैः निवारिता अपि सा पतिव्रता, यथा अर्यमणं प्रभा, तं न जहौ।१३। विप्र उवाच। '(हे) पिता, (हे) अम्ब, मया प्राक्+वैरतः इदं कष्टं अर्पितम्। साधु सात्त्विकया धृत्या जीवितुम्। (हे) सति अहं ते पूर्ववैरी। तत् मां विहाय आशु व्रज।'१४।

रोगाने कष्टलेला तो मुलगा आणि त्याच्या सेवेने तेवढीच कष्टणारी त्याची पत्नी ह्यांच्याकडे पाहणेसुद्धा आईवडिलांना दुःसह झाले. त्यांनी आपल्या सुनेला इतके कष्ट करू नकोस असे सांगूनही पाहिले. पण त्या पतिव्रतेने, सूर्याला जशी त्याची प्रभा, तसे आपल्याला पतीपासून क्षणभरही दूर होण्यास नकार दिला.१३. त्या सर्वांचे क्लेश पाहून तो पुत्र आईवडिलांना म्हणाला, 'मी तुम्हांला हे दुःख देत आहे ते पूर्वजन्मीच्या कांही वैराचा सूडच असावे. तुम्ही आतां उत्तम सात्त्विक धैर्याने ते सहन करून जीवन कंठायचे आहे. मग तो आपल्या पत्नीला म्हणाला, मी तुझा पूर्वजन्मीचा दावेदार आहे. मला दुर्भाग्याला सोडून तू लवकर माहेरी जा.'१४.

### ।। साध्व्युवाच ।।

**नार्हास्म्यनन्यशरणा परिहापितुं ते नन्वर्धसुन्दरशरीरविभागिनीयं ।**
**जीवोऽस्य साधुवपुषोऽस्ति भवान्वियुक्ते जीवे तनोर्ननु भवेत्खलु जीवहत्या ।।१५।।**
**सदा मदास्यं शशिशालि कालिमा कुतो यतो भैधत एवमेव ते ।**
**अकी सुखी यत्र भवत्यवत्यघात् तमीशमीडे स तु देवदेवतः ।।१६।।**
**नमो नमो वां श्वशुरौ मया श्रुतो गुरुः स गन्धर्वपुरेऽस्ति तारकः ।**
**असुप्रियोऽनामयमेति भाति मे सहामुना यास्य उ रोचतेऽपि वाम् ।।१७।।**

साध्वी उवाच। 'ते अनन्यशरणा परिहापितुं न अर्हा। ननु इयं अर्ध+सुंदर+शरीर+विभागिनी। भवान् अस्य साधु+वपुषः जीवः अस्ति। तनोः जीवे वियुक्ते खलु जीवहत्या भवेत्।'१५। सदा मत्+आस्यं शशि+शालि। कालिमा कुतो? यतो ते भा एधत एव। यत्र अकी सुखी भवति सः अघात् अवति। तं ईशं ईडि। स तु देवदेवतः।१६। (हे) श्वशुरौ, वां नमो नमः। मया श्रुतः गन्धर्वपुरे गुरुः अस्ति, सः तारकः। मे भाति असु+प्रियः अनामयं एति। अमुना सह यास्ये, वां रोचते अपि?'१७।

ती सती म्हणाली 'केवळ आपलाच एक आधार असलेल्या ह्या अगतिक स्त्रीचा त्याग उचित नाही. मी आपल्या या सुंदर शरीराची अर्धांगिनी आहे. आपण ह्या माझ्या शरीराचे प्राणच आहांत. देहापासून जीव वेगळा झाला तर ती जीवहत्याच होईल ना?' तिचे हे प्रतिपादन तैत्तिरीय संहितेच्या (६:१:८५) '*अर्धो वा एष आत्मा पत्नीशरीरम्।*' या वचनाशी सुसंगतच आहे.१५. माझे मुख सदैव तेजस्वीच आहे. आपली कांती जोवर वाढती आहे तोवर त्याला कुठलाही डाग लागणार नाही. दुःखी जीवाला सुखी करणारा आणि पापापासून रक्षण करणाऱ्या देवाची आपण स्तुती करू या. तोच सर्व देवांचाही देव आहे.१६. अहो मामंजी, मामी, तुम्हांला वारंवार नमन असो. मी असे ऐकले आहे की गाणगापूर येथे श्रीगुरू (नृसिंहसरस्वती) आहेत. तोच तारणहार आहे. आपल्याला जर रुचत असेल तर मी ह्यांना त्यांच्याकडे घेऊन जाते.१७.

**तावूचतुः क्वापि तव श्रमेण सम्राज्ञि जीवेत स तत्र गच्छ ।**
**श्रुत्वैवमाराच्छ्वशुरौ प्रणम्य तदाज्ञयाऽगात्सह तेन साध्वी ।।१८।।**
**सुखस्थितं मन्थरवाहवाहितं तमन्वगच्छत्पतिमङ्घ्रिचारिणी ।**
**दधौ कराकृष्टधवा गमानत-क्षमेभिभामुत्कुचगण्डकर्शिता ।।१९।।**
**क्रान्तेऽयनेथो कतिचिच्छनैः शनैर्मृत्युं धवोऽगात्स तदैव दैवतः ।**
**सा मर्तुमुत्कापि निवारितेतरैः शुक्तामसीम्लानमुखाम्बुजाऽवदत् ।।२०।।**

तौ ऊचतुः। (हे) सम्राज्ञि, तव श्रमेण सः (यत्र) क्वापि गच्छति तत्र गच्छ। एवं श्रुत्वा श्वशुरौ प्रणम्य तत्+आज्ञया तेन सह साध्वी अगात्।१८। सुख+स्थितं मन्थर+वाह+वाहितं तं पतिं अङ्घ्रि+चारिणी अनु+अगच्छत्। कर+आकृष्ट+धवा गम+आनत+क्षमा इभा+भां उत्कुच+गण्ड+कर्शिता दधौ।१९। कतिचित् शनैः शनैः अयने क्रान्ते तदा एव दैव+तः धवः मृत्युं अगात्। सा मर्तुं उत्का अपि इतरैः निवारिता। शुक्+तामसी+म्लान+मुख+अम्बुजा अवदत्।२०।

सासू-सासरे म्हणाले, 'वेदोक्तीला अनुसरून तू सम्राज्ञीच आहेस (ऋग्वेद १०:८५:४६). जिथे कुठे तुझ्या प्रयत्नांनी हा बरा होईल तिथे जा! याप्रमाणे त्यांची आज्ञा घेऊन आणि त्यांना नमस्कार करून आपल्या पतीसह ती सावित्री गाणगापूरला निघाली.१८. हळूहळू चालणाऱ्या भोयांनी चालविलेल्या मेण्यात सुखाने पतीला बसवून ती पायीच त्याच्यामागे चालू लागली. पाठीमागून तिने आपल्या पतीला धक्के बसू नयेत म्हणून धरले होते. हत्तीच्या गंडस्थलांप्रमाणे कठीण आणि उन्नत वक्षांच्या भारानेच जणू ती वाकली होती. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावानेच की काय पण खालची जमीनही नम्र झाली होती. हत्तीच्या मागे जाणाऱ्या हत्तीणीसारखी ती गजगामिनी भासत होती.१९. कांही दिवस याप्रमाणे हळूहळू मार्ग क्रमून गाणगापूरच्या जवळ आल्यानंतरच दैवयोगाने तिचा पती मृत्यू पावला. तिने तेव्हांच आत्महत्येचा प्रयत्न केला; पण इतरांनी तिला परावृत्त केले. पतीच्या मृत्यूचे दुःख हीच जणू रात्र, तिच्यामुळे तिचे मुखकमल कोमेजून गेले.आणि ती शोकग्रस्त बाला बोलू लागली.२०.

**कालात्ययं मा कुरु कुर्वथाह्निकमुत्तिष्ठ शेषे कति नाथ विप्रराट् ।**
**कस्मान्न मे दास्यसि वल्लभोत्तरं प्रेष्ठं नु किं ते वचनं व्यलङ्घ्यम् ।।२१।।**
**प्राणाः क्व याताश्च मनः क्व ते गतं द्राक्तान्परावर्तय जीवितुं चिरम् ।**
**लिप्तः स्वमातापितृदारहत्यया भविष्यसि त्वं न तथा करोषि चेत् ।।२२।।**
**उद्वाहितां क्वैषि विहाय मां प्रियां पुत्राननुत्पाद्य कथन्वृणोद्धृतिः ।**
**स्थातव्यमीश क्व कथं न भाषितं कथं व्रजेयं सदनं गुरोश्च वः ।।२३।।**

'(हे) नाथ, विप्र+राट् काल+अत्ययं मा कुरु, आह्निकं कुरु। उत्तिष्ठ, कति शेषे? (हे) वल्लभ कस्मात् मे प्रेष्ठं उत्तरं न दास्यसि? किं नु ते वचनं व्यलंङ्घ्यम्? २१। ते मनः क्व गतं, प्राणाः क्व याताः? तान् द्राक् परावर्तय चिरं जीवितुम्। त्वं तथा न करोषि चेत् स्व+माता+पितृ+दार+हत्यया लिप्तः भविष्यसि।२२।'मां उद्वाहितां प्रियां विहाय क्व एषि? पुत्रान् अनुत्पाद्य कथं नु ऋण+उद्धृतिः? (हे) ईश, क्व कथं स्थातव्यं न भाषितम्। वः गुरोः सदनं च कथं व्रजेयम्?२३।

'अहो नाथा, ब्राह्मणश्रेष्ठा, तुमची संध्येची वेळ कधीच टळत नाही, लवकर उठून संध्या करा. किती झोप ही? वल्लभा, प्रियतमा माझ्याशी तुम्ही का बरे बोलत नाही? मी कांही तुमची अवज्ञा केली का?२१. मन ज्याचे चिंतन करते तेच वाचा बोलते. वाचेचा उपसंहार झाल्यावर केवळ मनाचे मननच उरते. मनाचाही लय झाल्यावर प्राणच राहतात. म्हणून ती साध्वी पतीला विचारते आहे, तुमचे मन, तुमचे प्राण कुठे गेले? जर ते परलोकांत गेले असतील तर लवकर त्याना परत आणा. तुम्हाला अजून पुष्कळ काळ जगायचे आहे. तुम्ही जर तसे केले नाही तर तुम्हांला आपल्या मातापित्यांच्या आणि पत्नीच्या हत्येचा दोष लागेल.' तुमच्यामागे आम्ही कुणीच जगू शकत नाही असा अभिप्राय.२२. 'मला, तुमच्या परिणीत पत्नीला सोडून कुठे जाता? आपल्याला पुत्रही झालेला नसता तुम्ही पितरांच्या ऋणातून कसे मुक्त व्हाल? तुमच्यामागे मी कुठे आणि कसे राहावे तेही जाण्यापूर्वी तुम्ही सांगितले नाहीत! तुमच्या मातापित्यांच्या घरी तरी मी कशी जाऊ?२३.

**सर्वत्र पूता त्वयि जीवतीशितर्-मदास्यमप्यद्य न कोऽपि पश्यति ।**
**सव्रीडनर्मोक्तिसुतल्पहावयुक्ताम्बूललेपादि कथं न ते हृदि ।।२४।।**
**सुखं स्वपोरूत्कुचभारभङ्गभीभीतमध्यात्मसुतल्प ईश ।**
**किं ते शिलाढ्ये शयनं कुपृष्ठे सुप्तः पृथङ्नर्तुमृतेऽद्य किं तत् ।।२५।।**
**नक्रोऽप्सु यद्वत्तृषितं यथा द्रुः श्रान्तं यथा गां तृणगां च हिंस्रः ।**
**प्रासाद ईशेक्षकमुन्निहन्ति जातं तथा मे गुरुदर्शनाप्तेः ।।२६।।**

त्वयि ईशितः जीवति सर्वत्र पूता। अद्य मत्+आस्यं अपि कः अपि न पश्यति। सव्रीड+नर्म+उक्ति सुतल्पं हावयुक् ताम्बूल लेपादि कथं ते हृदि न?२४। (हे) ईश, उरु+उत्+कुच+भार+भङ्ग+भी+भीतं अध्यात्म+सुतल्पं सुखं स्वप। ते शिला+आढ्ये कुपृष्ठे शयनं किम्? ऋतुं ऋते पृथक् न सुप्तः। अद्य किं तत्?२५। यथा तृषितं अप्सु नक्रः, श्रान्तं द्रुः, तृणगां गां च हिंस्रः, ईश+ईक्षकं प्रासादः उत् निहन्ति, तथा मे गुरु+दर्शन+आप्तेः जातम्।'२६।

तुम्ही, माझे स्वामी जिवंत असतांना मी सर्वत्र पवित्र गणली जात होते. आता माझे तोंडही कुणी पाहत नाही. ते लाजत केलेले विनोद, ती सुखशय्या, श्रांगारिक भावाने दिलेले विडे, सुगंधी उटण्याचे लेप हे सगळेच तुम्ही विसरून गेलां काय?२४. पुष्ट आणि उन्नत स्तनांनी मोडण्याच्या भयाने जणू घाबरलेल्या कटीचा हा माझा देह हीच उत्तम शय्या आहे. तिच्यावर आपण सुखाने पहुडा. हे असे दगडांच्या खडबडीत पृष्ठावर का झोपला? ऋतुकाल सोडला तर आपण कधीही माझ्यापासून वेगळे झोपला नाहीत. मग आताच का बरे दूर झोपलात?२५. तहानलेला नदीवर पाणी पिण्यास जावा आणि त्याला सुसरीने धरावे, थकलाभागला झाडाखाली बसावा आणि ते झाडच त्याच्यावर पडावे, भुकेली गाय गवताळ रानांत शिरावी आणि तिथे वाघाने तिच्यावर झडप घालावी, देवाच्या दर्शनाला देवळांत आलेल्यावर ते देऊळच अंगावर पडावे तसे आपल्या भेटीला आलेल्या माझ्यावर हा घोर प्रसंग ओढवला आहे.२६.

**जयेश्वरानन्त कथं त्वया कृतं भिया त्वयात्रापहृतोऽस्ति किं पतिः ।**
**रुक्शान्तिशक्तिर्यदि ते न गम्यतामिति त्वयोक्ते कतमोऽर्दितुं क्षमः ।।२७।।**
**त्वया कृतं साधु यशो दिवं ते वहामि भर्त्रा सह गौरिमातः ।**
**क्वेता ह्यवैधव्यकदानशक्तिर्व्रतेश्वरीशे न कथं स्मृतिर्मे ।।२८।।**
**माङ्गल्यतन्तुं च निशां च कुङ्कुमं हर्तुं महांश्चोर इहागतः कुतः ।**
**सौभाग्यनौर्मे भवसिन्धुसंस्थिता सा कालमीनेन कथं नु चर्विता ।।२९।।**

(हे) ईश्वर (हे) अनन्त, जय! त्वया कथं कृतम्? अत्र भिया पतिः अपहृतः अस्ति किम्? यदि ते रुक्+शान्ति+शक्तिः न, त्वया 'गम्यताम्' इति उक्ते कतमः अर्दितुं क्षमः?'२७। 'त्वया साधु कृतं, ते यशो भर्त्रा सह दिवं वहामि। (हे) मातः गौरि अवैधव्यक+दान+शक्तिः क्व इता? (हे) ईशे, व्रत+ईश्वरी मे स्मृतिः कथं न?२८। माङ्गल्यतन्तुं च निशां च कुंकुमं हर्तुं महान् चोरः इह कुतः आगतः? मे सौभाग्य+नौः भव+सिन्धु+संस्थिता सा काल+मीनेन कथं नु चर्विता?२९।

'परमेश्वरा, अनंता, आपण हे काय केलेत? माझ्या पतीला निरोगी करण्याच्या धाकाने त्याला माझ्यापासून हिरावले काय? जर तुमचे रोग बरा करण्याचे सामर्थ्य नसेल आणि तुम्ही मला घालवून दिले तर आपल्याला जाब विचारण्याची कुणाची टाप आहे?'२७. 'छान केलंस देवा! तुझी कीर्ती या पतीसह आता स्वर्गांत घेऊन जाते. आई, मंगळागौरी तुझे अवैधव्य देण्याचे सामर्थ्य कुठे गेले? हे व्रताच्या देवी, भगवती, '*विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे*' अशी तुझी प्रार्थना करणाऱ्या माझा तुला कसा विसर पडला?'२८. 'माझ्या मंगलसूत्रावर आणि हळदीकुंकवावर घाला घालणारा हा काळरूपी महान् चोर इथे श्रीगुरूंच्या सान्निध्यांत कुठून आला?' श्रीगुरूंच्या जवळ मृत्यूलासुद्धा प्रवेश नाही असा तिचा भाव व्यक्त होतो. 'संसारसागरांतली माझी सौभाग्यनौका काळरूपी मगरीने कशी हो गिळून टाकली?'२९.

**एवं रुदित्वोरुकुचत्रुटत्पटा संस्मृत्य संस्मृत्य तदीयचेष्टितम् ।**
**प्रत्यङ्गमालम्ब्य रुरोद मोहतः साध्वी तदा कश्चन साधुराययौ ।।३०।।**
**रुद्राक्षभूषो भसिताक्तदेहः शूली बभाषे जटिलः स साध्वीम् ।**
**बाले शुचा नैति मृतः कुतस्त्वं मुधोच्चकै रोदिषि तिष्ठ तूष्णीम् ।।३१।।**
**मृत्युर्न केषां विषयोऽपि देवान्ग्रसत्यसौ चापरिहार्य एव ।**
**द्रौ व्यैक्यमब्धौ च यथेन्धनैक्यं भवप्रवाहेऽपि तथा धवादिः ।।३२।।**

एवं रुदित्वा उरु+कुच+त्रुटत्+पटा साध्वी तदीय चेष्टितं संस्मृत्य संस्मृत्य, प्रत्यंगं आलम्ब्य, मोहतः रुरोद। तदा कश्चन साधुः आययौ।३०। रुद्राक्ष+भूषः भसित+आक्त+देहः शूली सः साध्वीं बभाषे। '(हे) बाले, मृतः शुचा न एति। त्वं मुधा उच्चकैः कुतः रोदिषि? तूष्णीं तिष्ठ।३१। मृत्युः केषां न विषयः? असौ देवान् अपि ग्रसन्ति। अपरिहार्य एव। यथा द्रौ वि+ऐक्यं, अब्धौ च इन्धन+ऐक्यं, तथा भव+प्रवाहे अपि धवादिः।३२।

असा विलाप करीत रडत भेकत, अंगावरची चोळी फाटलेल्या अवस्थेत पतीच्या आठवणी काढीत, त्याच्या अंगप्रत्यंगांना कवटाळीत बेभान होऊन ती साध्वी शोक करीत असताना तेथे कोणी एक साधू आला.३०. गळ्यात रुद्राक्षाच्या माळा, अंगावर भस्माचे पट्टे आणि हातात शूल धारण केलेला तो साधू तिला म्हणाला, 'कितीही रडलीस तरी मेलेला परत येणार आहे का? तसे असेल तर अवश्य रड! पण तसे होत नाही. व्यर्थ उच्चस्वराने रडू नकोस. शांत राहा.३१. तुझ्या पतीच्या मृत्यूच्या दुःखाने हा शोक तू करत असशील तर असे पाहा, मृत्यू कुणाला चुकला आहे? हा देवादिकांचाही ग्रास करतो. तो अटळच आहे. पतीच्या विरहामुळे तुला दुःख झाले असे म्हणशील तर झाडावर पक्षी एका रात्रीसाठी एकत्र येतात आणि सकाळ झाली की आपापल्या वाटेने निघून जातात. किंवा समुद्रामध्ये लाकडाचे ओंडके एकत्र येतात आणि पुन्हा परस्परांपासून दूर वाहून जातात. तसे पती, पत्नी, माता, पिता, बंधू, भगिनी इत्यादि संबन्ध हे तात्कालिकच असतात. संसारसागरांत कांही क्षण मात्र एकत्र येऊन पुन्हा आपापल्या प्रारब्धानुसार आपापल्या कर्मानुसार भ्रमण करीत असतात.'३२

**सम्बन्ध एषां नियतो मतश्चेत् प्राग्जन्मनि त्वं वद कस्य का वा ।**
**सम्बन्धिनः कस्य न केऽद्वयत्वाज्जीवश्चिदंशोऽखिलगोऽव्ययोऽजः ।।३३।।**
**पञ्चात्मकेऽस्मिन्खलु संगतेऽत्र भर्त्रादिबुद्धिर्न तु तत्त्वतोऽस्य ।**
**काष्ठाग्निवत्तं तु पुमादिलिङ्ग-हीनं धवादिं प्रकृतिस्थमाहुः ।।३४।।**

'एषां संबन्धः नियतः मतः चेत् त्वं प्राक् जन्मनि कस्य का वा? अद्वयत्वात् कस्य के अपि संबन्धिनः न। जीवः चित्+अंशः अखिलगः, अव्ययः, अजः।३३। अस्मिन् पञ्च+आत्मके संगते अत्र भर्त्रा+आदि+बुद्धिः अस्य न तु तत्त्वतः। काष्ठ+अग्नि+वत् प्रकृति+स्थं पुं+आदि+लिङ्ग+विहीनं धव आदिं आहुः।३४।

'पती, पुत्र इत्यादि संबन्ध जर तुला कायमचे वाटत असतील तर मग सांग बरं तू पूर्वजन्मी कुणा पुरुषाची कोण - पत्नी, माता, कन्या इत्यादि होतीस? वेदांताच्या सिद्धांतानुसार (छांदोग्य उपनिषत् ६:२:१) 'एकच एक ब्रह्म आहे त्याहून वेगळे कांहीच नाही; आणि ते तू आहेस.' अर्थातच त्याला संबंधी कसे व कुठले असणार? 'हा जीव माझाच अंश आहे', या भगवद्गीतेच्या (१५:१७) प्रतिपादनानुसार जीव हा चैतन्याचाच अंश आहे. भगवंतांनीच दुसऱ्या अध्यायांत (२०) म्हटल्याप्रमाणे हा न कधी जन्मतो न मरतो, हा कधी कुणाचा झाला नाही किंवा होणार नाही; हा जन्ममृत्यूरहित, नित्य, शाश्वत आणि पुरातन आहे; शरीराचा नाश केला तरी याचा नाश होत नाही.३३. पंचभूतांच्या या देहांत जीवाचा अनुप्रवेश झाल्यावर होणाऱ्या पती, पिता आदि भावना वेदांच्या कोणत्याही प्रमाणांना धरून नाहीत. लाकडाला आग लागली ती जशी त्याचाच आकार घेते तसा चैतन्याचा अंश असलेला जीव त्या त्या देहासारखा भासतो. कठोपनिषदांत (२:५:९) सांगितल्याप्रमाणे अग्नी ज्या ज्या पदार्थांत प्रवेशतो त्या त्या रूपाचाच होतो. त्याचप्रमाणे हा एकच अंतरात्मा विविध देहांमध्ये प्रवेश करून ती ती रूपे धारण करतो. खरे तर त्या चैतन्याला न रूप आहे न लिंग. तो न स्त्री आहे, न पुरुष, न नपुंसक. जे जे शरीर तो धारण करतो त्याचे गुणधर्म त्याच्यावर आरोपित होतात (श्वेताश्वतर उ. ५:१०). अशा त्या प्रकृतीत स्थिरावलेल्या आत्म्याला अज्ञानी लोक हा 'माझा पती, हा माझा पिता, हा माझा पुत्र' इत्यादि म्हणतात.३४.

**प्राप्तः प्रकृत्युत्थगुणानुगोऽसौ शरीरतादात्म्यमतोऽस्य वृद्धा ।**
**द्वन्द्वप्रतीतिर्न तु सामलेऽजे द्वन्द्वोत्थकर्माश्रयिणो भवोऽस्ति ।।३५।।**
**भवोद्भवः कर्मत एव कर्म भवोद्भवं तूभयमज्ञभावात् ।**
**धीरेण येनोभयमेव कृत्तं तत्त्वासिना तस्य न वै भ्रमोऽयम् ।।३६।।**

प्रकृति+उत्थ+गुण+ अनुगः असौ शरीर+तादात्म्यं प्राप्तः। अतो अस्य द्वन्द्व+प्रतीतिः वृद्धा। सा तु अमले अजे न। भवः द्वन्द्व+उत्थ+ कर्म+आश्रयिणः अस्ति।३५। कर्मतः एव भव+उद्भवः, कर्म भव+उद्भवं, उभयं तु अज्ञभावात्। येन धीरेण उभयं एव तत्त्व+असिना कृत्तं तस्य अयं भ्रमः न वै।३६।

प्रकृतीतून उद्भवलेल्या गुणांना अनुसरल्याने हा जीव शरीराशी तादात्म्य पावतो. आपण हे शरीरच आहो अशा मोहांत पडतो. त्यामुळे आपण स्त्री आहो किंवा पुरुष आहो इत्यादि कल्पनांनी सुख-दुःखादि द्वंद्वाचा अनुभव घेतो. ही द्वंद्वप्रतीती शुद्ध, निर्विकार आत्मस्वरूपांत नसते. ह्या द्वंद्वाच्या प्रतीतीतून कर्मे घडतात आणि तीच ह्या जन्ममरणरूपी संसाराचा आश्रय आहेत.३५. असे जर आहे तर कुणी एक देवदत्त जन्मला तर त्याचे यथाशास्त्र जातक करावे अशी लोकांची आणि शास्त्राचीही मान्यता कां आहे? पूर्वजन्माच्या कर्मापासूनच भवाचा म्हणजे देहाचा उद्भव होतो; तसेच त्या देहाने केलेले कर्म (क्रियमाण) हेच पुढच्या जन्माला कारण होते; अशा परस्पर कार्यकारणभावाने जुडलेले देह आणि कर्म ह्या दोन्हींच्या मुळाशी अज्ञान हेच कारण आहे. ब्रह्मसूत्रांतील दोन अधिकरणानी (२.३.१७-१८) हा विषय स्पष्ट केला आहे. स्थावर अथवा जंगम यांच्या संदर्भांत जन्म-मरण हे शब्द शरीराच्या उत्पत्ती आणि लयाला उद्देशून वापरलेले आहेत. जातकर्मविधान हेसुद्धा देहाच्या उत्पत्तीला अनुलक्षून आहे. त्याला जन्म ही केवळ संज्ञा दिली आहे. पुढच्याच सूत्रांत सांगितले आहे की, जीवात्मा कधीच जन्मत नाही कारण तशा अर्थाची श्रुति नाही; उलट त्याच्या नित्यत्वाचे, अजत्वाचे, अविकारित्वाचे प्रतिपादन करणाऱ्या अनेक श्रुति आहेत. वेगळ्या शब्दांत असे म्हणतां येईल की उपाधींचा जन्म हाच जन्म आहे आणि उपाधींचा नाश हेच मरण आहेत, त्यांचा जीवात्म्याशी कांही संबंध नाही. जन्म आणि कर्म ह्या दोन्हींचा छेद जो तत्त्वज्ञानरूपी खड्गाने करतो तो या जन्ममरणरूपी भ्रमांतून सुटतो.३६.

**अस्यास्त्यविद्यैव घटादिवद्‍द्यो रुपाधिरात्मत्वमुपाध्यपाये ।**
**मालाहिवत्कल्पित एति नाशं भ्रमोऽस्य सद्दर्शितत्त्वदीपात् ।।३७।।**

द्योः घटादिवत् अस्य अविद्या उपाधिः अस्ति। उ पाधि+अपाये आत्मत्वम्। सत्+दर्शित+तत्त्व+दीपात् अस्य भ्रमः कल्पित माला+अहिवत् नाशं एति।'३७।

जन्म-मरणाला कारण ही उपाधी कोण आहे? आकाशाला जशा घट, मठ आदि उपाधी असतात, ज्यामुळे आकाश सीमित झाल्यासारखे वाटते, तशाच आत्म्याला परिच्छिन्न भासवणाऱ्या देहादि उपाधी आहेत. घट-मठादि उपाधींचा नाश झाला तरी आकाश जसेच्या तसेच राहते. त्याचप्रमाणे देहादि उपाधींचा नाश झाला तरी निर्विकल्प आत्मस्वरूप निर्बाधच राहते. श्वेताश्वतर उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (६:११) सर्व भूतमात्रांत एकच अंतरात्मा गूढ रूपाने वास करतो; हाच सर्वव्यापी निर्गुण एकमेवाद्वितीय देव सर्वांच्या अंतरांत साक्षित्वाने राहून त्यांच्या कर्माचे नियंत्रण करतो. अविद्येच्या उपाधीने त्याचे विभाजन झाल्यासारखे वाटते आणि तोच ज्ञानमय, मनोमय, प्राणमय इत्यादी स्वरूपांत भासतो; अर्थातच उपाधींचा संबंध सुटल्यावर त्याचे सहज स्वरूपच राहते. बृहदारण्यक उपनिषदांत (४:१५:१३) प्रज्ञानघनाच ह्या भूतांपासून उड्डून जातो आणि त्या भूतांचा लय होतो असे सांगितले आहे तो उपाधीचाच प्रलय आहे, आत्म्याचा नव्हे.

**ज्ञानदीप -** *सता* म्हणजे संतांनी दाखविलेल्या दिव्याच्या उजेडाने, माळेवर भासणाऱ्या सर्पासारखा, ह्याचा अनादिकालासून प्रतीत झालेला भ्रम नष्ट होतो. '*सता*'चा अर्थ असाही घेता येईल की आपल्या भक्तांच्या अंतःकरणातील सत्यज्ञानानन्त इत्यादि लक्षणाच्या ईश्वराने आपल्या भक्तावरील अतीव करुणेने दर्शविलेला, भक्तीच्या तेलाने भिजवलेली ब्रह्मचर्यादि साधनांच्या संस्कारलेली बुद्धी हीच ज्याची वात, भगवद्भावाच्या अभिनिवेशाच्या वायूने प्रेरलेला, विषयांच्या वाऱ्यापासून रक्षिलेल्या, आणि म्हणून रागद्वेषादि काजळी नसलेल्या चित्तांत ठेवलेल्या विवेकप्रत्ययरूप अशा ज्ञानदीपाच्या, नित्य अभ्यासाने एकाग्र ध्यानाने झालेल्या सम्यक् दर्शनरूपी प्रकाशाने, अज्ञानापासून उद्भवलेला मिथ्याप्रत्ययरूपी मोहांधःकार नाहीसा होतो. '*तेषामेवानुकंपार्थं अहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता।।*' भ.गीता १०-११।।३७.

**तावद्भ्रमान्तौ नियतौ द्युरात्रिवज्जन्तोरतस्तत्त्वविचारवान्भवेत् ।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयात्मशोकतः स्वार्थः कुतः साध्वि समुद्भवेद्वद ॥३८॥**
**तस्माच्छुचं मुञ्च सति प्रसाधय स्वार्थं यथा येन भवं तरिष्यसि ।**
**तत्काल एषैव यदा प्रमादतो याता नृयोनिस्तु पुनर्न तत्कथा ॥३९॥**

**॥ साध्व्युवाच ॥**

**प्राप्ता धवानामयहेतुनाधुना दैवात्पथेऽस्मिन्दयितो मृतः पितः ।**
**सम्बन्धिनोऽप्यन्तरितास्त्वमेव मे सर्वोऽसि मामुद्धर दुःखसागरात् ॥४०॥**

तावत् जन्तोः भ्रम+अंतौ द्यु+रात्रिवत् नियतौ। अतः तत्त्व+विचारवान् भवेत्। (हे) साध्वि, त्वक्+रक्त+मांस+अस्थि+मय+आत्म+शोकतः कुतः स्वार्थः समुद्भवेत्?३८। तस्मात् (हे) सति, शुचं मुञ्च। स्वार्थं प्रसादय, येन यथा भवं तरिष्यसि। एष एव तत् कालः। यदा प्रमादतो नृ+योनिः याता तु पुनः तत्+कथा न।३९। साध्वी उवाच। धव+अनामय+हेतुना प्राप्ता। दैवात् अस्मिन् पथे दयितः मृतः। पितः सम्बन्धिनः अपि अन्तरिता। त्वं एव मे सर्वः असि। मां दुःख+सागरात् उद्धर।४०।

'तत्त्वज्ञानदीपाने अज्ञानतमाचा नाश होईपर्यंत जीवाला हे जन्मरूपी भ्रम आणि उपाधिनाशरूपी मरण ही दिवस आणि रात्र यांप्रमाणे ठरलेले आहेत. तेवढ्यासाठी विचार-विवेक केला पाहिजे. त्वचा, मांस, रक्त, अस्थी इत्यादींच्या बनलेल्या शरीरासंबंधी शोक करत राहण्याने खरा स्वार्थ - मनुष्यजन्माचे ध्येय जो मोक्ष, तो कसा सिद्ध होणार?३८. याकरिता हे सती, हा शोक आवर आणि पारलौकिक स्वार्थ साध. त्यानेच तू हा भवसागर तरशील. हीच ती वेळ आहे. जोपर्यंत वार्धक्याने इंद्रिये दुर्बल होत नाहीत, शरीर परावलंबी होत नाही तोपर्यंतच हा प्रयत्न करायला हवा. एकदा हा मानव जन्म प्रमादाने हातातून निसटला की पुनः त्याची वार्ताही दुर्लभ होईल.'३९. ती सती म्हणाली, 'माझ्या पतीला आरोग्य व्हावे म्हणून मी दुरून इथे आले आहे. दुर्दैवाने इथे वाटेतच माझ्या पतीला मृत्यू आला. वडीलधारे व इतर संबंधीही दुरावले. आता आपणच माझे सर्व कांही आहात. ह्या दुःखसागरातून मला वर काढा! माझा उद्धार करा' हे सतीच्या मुखांतील शब्द गुरूपसत्तीचे निदर्शक आहेत.४०.

**।। साधुरुवाच ।।**

**भर्तैव तारकं साध्व्या नोपाया बहवो नृवत् । शृण्वगस्त्यसतीस्तोत्र-प्रसङ्गोक्तं वृषं सुरैः ।।४१।।**
**विन्ध्योत्कर्षभियैत्य तद्गुरुमगस्त्यं तद्वधूं निर्जरैः । साकं देवगुरुर्जगौ सति रमा सावित्र्युमारुन्धती ।।**
**इत्याद्या अपि साध्व्य उत्तमतमा तासां त्वमेवास्यहो। छायेवानिशमीशसेवनपरा त्वन्निघ्नमेतज्जगत् ।।४२।।**
**भक्त्या छायेव याश्रान्तं स्वभर्तृपरिचारिणी । पतिरेव व्रतं यस्या अखण्डं सा पतिव्रता ।।४३।।**

साधुः उवाच। 'साध्व्या भर्ता एव तारकः। नृवत् बहवः उपायाः न। सुरैः अगस्त्य+सती+स्तोत्र+प्रसङ्ग+उक्तं वृषं शृणु।'४१। विन्ध्य+उत्कर्ष+भिया तत्+गुरुं अगस्त्यं निर्जरैः साकं एत्य देवगुरुः तत्+वधूं जगौ। '(हे) सति, रमा, सावित्री, उमा, अरुन्धती इत्याद्या साध्व्यः। तासां त्वं एव छाया इव अनिशं ईश+सेवन+परा उत्तमतमा असि। एतत् जगत् त्वत्+निघ्नम्।४२। या भक्त्या छाया इव अश्रान्तं स्व+भर्तृ+परिचारिणी, यस्या पतिः एव अखण्डं व्रतं, सा पतिव्रता।४३।

तेव्हां तो साधू उत्तरला, 'स्त्रियांना पती हाच एकमेव तारक (तारकः) आहे. पुरुषांप्रमाणे त्यांच्यासाठी अनेक उपाय नाहीत. देवांनी अगस्तीची पत्नी लोपामुद्रा हिचे स्तवन करताना प्रसंगाने सांगितलेला (स्त्रियांचा) धर्म मी तुला सांगतो. ऐक.' *'भर्तैव ता रकं'* असा पाठ घेतला तर भर्ता हाच हृदयस्थ तारक ब्रह्म आहे असा अर्थ लावावा.४१. स्कंद पुराणातील कथा आहे. मेरु पर्वताच्या ईर्षेने विंध्य पर्वत आपली उंची वाढवू लागला. वाढत वाढत तो सूर्यमंडलासमोरून स्वर्गभुवनाच्या वर गेला. त्यामुळे त्याच्या दक्षिणेला सूर्यकिरण पोचेनात. अर्थात सर्व यज्ञादिकर्मांचा लोप होऊ लागला. तेव्हा विंध्य पर्वताला नमविण्यासाठी त्याचे गुरू अगस्ती ऋषी यांच्याकडे सर्व देवांसह बृहस्पती गेले. त्या वेळी अगस्तींची पत्नी लोपामुद्रा हिची स्तुती करतांना देवगुरू बृहस्पतींनी स्त्रियांचे धर्म सांगितले. ते म्हणाले, 'हे सती लोपामुद्रे, लक्ष्मी, सावित्री, पार्वती, अरुन्धती इत्यादि महान साध्वी आहेत. पण सावलीसारखी पतीची निरंतर सेवा करणारी तूच सर्व पतिव्रतात श्रेष्ठतम आहेस. जी भक्तिभावाने आपल्या पतीची सावलीसारखी अथक सेवा करते आणि पती हेच जिचे अखंड व्रत आहे ती पतिव्रता.'४३.

**पादाम्बु तीर्थमुच्छिष्टं प्रसादो देवतार्चनम् । तत्सेवा भूषणं तोषो धर्मोऽनुज्ञानुपालनम् ।।४४।।**
**वशानुवर्तनं देह-यात्रा श्वश्र्वादिगौरवम् । लोकयात्रेश्वरो भर्ता करणं पोष्यपोषणम् ।।४५।।**
**कार्यं नाज्ञां विना किञ्चिद् दूरात्स्थेयं स्थिते प्रिये । सुप्तोत्थितात्प्रागुत्थाय सेव्योऽश्रान्तं पतिर्मुदा ।।४६।।**
**तस्मै दत्वेष्टमाप्लुत्य गृहसंमार्जिनादिकम् । दत्वेशायेष्टसंभारा देयाः स्वादु च भोजनम् ।।४७।।**
**क्रुद्धश्चेत्प्रार्थनीयो न गन्तव्यं परसद्मनि । नाज्ञां विना गुरोर्गेहे न वक्तव्यं सदेतरैः ।।४८।।**

पाद+अम्बु तीर्थं, उच्छिष्टं प्रसादो, तत्+सेवा देवता+अर्चनं, तोषो भूषणं, अनुज्ञा+अनुपालनं धर्मः।४४। वश+अनुवर्तनं देहयात्रा, श्वश्रू+आदि+गौरवं लोकयात्रा, भर्ता ईश्वरो, पोष्य+पोषणं करणम्।४५। आज्ञां विना किञ्चित् (अपि) न कार्यम्। प्रिये स्थिते दूरात् स्थेयम्। सुप्त+उत्थितात् प्राक् उत्थाय पतिः अश्रान्तं मुदा सेव्यः।४६। तस्मै इष्टं दत्वा आप्लुत्य गृह+संमार्जन+आदिकम्। ईशाय इष्ट+संभारा, स्वादु भोजनं च देयाः। ४७। क्रुद्धः चेत् प्रार्थनीयः। परसद्मनि न गन्तव्यम्। आज्ञां विना गुरोः गेहे न (गन्तव्यम्)। सदा इतरैः न वक्तव्यम्।४८।

आपल्या पतीच्या पायावरचे पाणी हेच तीर्थ, त्याचे उच्छिष्ट हाच प्रसाद, त्याची सेवा हीच देवपूजा, त्याचा संतोष हाच अलंकार आणि त्याच्या आज्ञेचे पालन हाच धर्म जाणावा.४४. पतीच्या मर्जीनुसार वागणे हीच तिची देहयात्रा आहे तर सासू-सासरे इत्यादींचा मान ठेवणे हीच तिची लोकयात्रा आहे. पती हाच तिचा परमेश्वर आहे. लहान-थोर सर्व पोष्य कुटुंबियांचे पोषण हे तिचे कर्तव्य आहे.४५. पतीच्या आज्ञेवाचून कांहीही करू नये. पती उभा असेल तर आपण मर्यादेने थोडे अंतर ठेवून उभे राहावे. पती झोपून उठायच्या आत आपण उठावे आणि आनंदाने अविश्रांत पतीची सेवा करावी.४६. पतीला हवे ते देऊन स्नानादि करावे आणि घराचा स्नान-सडा करावा. पतीला पूजादिकांसाठी पाणी, फुले इत्यादि इष्ट ती सामुग्री देऊन त्याला रुचकर भोजन द्यावे.४७. पती रागावले तर त्याची विनवणी करावी. दुसऱ्यांच्या घरी जाऊ नये. पतीच्या परवानगीशिवाय आपल्या माहेरी जाऊ नये. सारखे विनाकारण दुसऱ्यांशी बोलू नये.४८.

**मन्दं श्वश्र्वादिसामीप्ये वक्तव्यं सन्धयेशितुः । इष्टं देहीति नो वाच्यं वक्तव्यं परवक्त्रतः ।।४९।।**
**स्वीकार्यं वस्त्रभूषादि भर्त्रा दत्तं यदृच्छया । न निन्द्यो दुर्भगो दीनो दुःशीलोऽपि शिवोपमः ।।५०।।**
**न कार्यं स्वैरिणीसख्यं स्वानां पार्थक्यमप्युत । धार्याः सौभाग्योपचारा न भूषाः प्रोषिते प्रिये ।।५१।।**
**दर्शितव्यं मुखं नर्तौ श्रोतव्यं नागमादिकम् । स्नात्वा चतुर्थेऽह्नि भर्ता प्रेक्ष्यो वाऽसम्भवे रविः ।।५२।।**
**प्रोषितेऽर्च्याज्ञया स्थेयं प्रत्युद्गन्तव्यमागते । सव्रीडहावरत्यङ्घ्रि-सेवाद्यैस्तोषणीय इत् ।।५३।।**

श्वश्रू+आदि+सामीप्ये मन्दं वक्तव्यम्। ईशितुः सन्धया (वक्तव्यम्)। इष्टं देहि इति नो वाच्यम्। पर+वक्त्रतः वक्तव्यम्।'४९। 'भर्त्रा यदृच्छया दत्तं वस्त्र+भूषा+आदि स्वीकार्यम्। न निन्द्यः। दुर्भगः, दानः, दुःशीलः अपि शिव+उपमः।५०। स्वैरिणी+सख्यं न कार्यम्। स्वानां पार्थक्यं अपि। सौभाग्य+उपचाराः धार्याः। प्रिये प्रोषिते भूषाः न (धार्याः)।५१। ऋतौ मुखं न दर्शितव्यं, आगमादिकं न श्राव्यम्। चतुर्थे अह्नि स्नात्वा भर्ता प्रेक्ष्यः। वा असम्भवे रविः (प्रेक्ष्यः)।५२। प्रोषिते अर्च्य+आज्ञया स्थेयम्। आगते प्रत्युद्गन्तव्यम्। स+व्रीड+हाव+रति+अङ्घ्रि+सेवाद्यैः तोषणीयः इत्।५३।

सासू-सासरे इत्यादी वडीलधाऱ्यांशी नम्रतेने आणि हळू बोलावे. पतीशीही मर्यादेने बोलावे. आपल्याला 'अमुक पाहिजे' असे न म्हणता इतरांच्या (पुत्र-कन्या आदि) तोंडून त्यांच्या कानांवर घालावे.४९. पतीने स्वेच्छेने दिलेली वस्त्रे, अलंकार स्वीकारावे. त्याची निंदा करू नये. भाग्यहीन, दरिद्री आणि दुःशील जरी असला तरी तो शिवासमान पूज्य मानावा.५०. स्वैराचारी स्त्रियांशी मैत्री करू नये. आपल्या सासरच्या लोकापासून वेगळे होऊ नये. हळदी, कुंकू, काजळ, शेंदूर आणि लेणी (मंगळसूत्र इत्यादि) हे सौभाग्य उपचार धारण करावेत. पती गावाला किंवा परदेशाला गेल्यावर अलंकार वर्ज्य करावेत.५१. ऋतुकाळी तोंड दाखवू नये, वेदादिक ऐकू नयेत. चौथ्या दिवशी स्नान करून पतीचे तोंड पाहावे. ते शक्य नसेल तर सूर्याचे दर्शन घ्यावे.५२. पती दूर गांवाला गेल्यावर सासू-सासरे इत्यादि वडीलधाऱ्यांच्या आज्ञेने राहावे. पती बाहेरून आल्यावर सामोरे जावे. लज्जा, हावभाव, संभोग, पाय चुरणे इत्यादींनी त्याला संतोषवावे.५३.

**सुप्तेऽस्मिन्च्छयनं कार्यं नोच्चार्यं पतिनाम च । भोक्तुं नान्यत्र गन्तव्यं याच्ञा कार्या न कुत्रचित् ।।५४।।**
**वैषम्येऽपि सुखं कल्प्यं कल्प्येशे दुःखिते न मुत् । त्याज्यमुच्चासनं लीला धवाद्यग्रे हसस्तथा ।।५५।।**
**प्रतिवादाच्छुनी भर्तुरुलूकी गुरुवर्जनात् । पतिं विना स्वादुभुक्त्या वराहोलूकयोनिगा ।।५६।।**
**मूका रोषोक्त्या व्याघ्री स्यात् कृतताडनभाषिणी । सपत्नीवैरतः स्त्री स्याद् दुर्भगा जारगा कृमिः ।।५७।।**
**पत्यौ मृतेऽनुगन्तव्यं स्थेयं वा विधवावृषे । शवाभावे गर्भिणीत्वेऽल्पेऽर्भे वैधव्यपालनम् ।।५८।।**

अस्मिन् सुप्ते शयनं कार्यम्। पति+नाम न उच्चार्यम्। भोक्तुं अन्यत्र न गन्तव्यम्। कुत्रचित् याच्ञा न कार्या।५४। वैषम्ये अपि सुखं कल्प्यम्। ईशे दुःखिते मुत् कल्प्यः। धवादि अग्रे उच्च+आसनं, लीला तथा हसः त्याज्यम्।५५। भर्तुः प्रतिवादात् शुनी, गुरु+वर्जनात् उलूकी, पतिं विना स्वादु+भुक्त्या वराह+उलूक+योनिगा।५६। रोषोक्त्या मूका, कृत+ताडन+भाषिणी व्याघ्री स्यात्। सपत्नी+वैरतः स्त्री दुर्भगा स्यात्। जारगा कृमिः।५७। पत्यौ मृते अनुगन्तव्यं वा विधवा+वृषे स्थेयम्। शव+अभावे, गर्भिणित्वे, अल्पे अर्भे वैधव्य+पालनम्।५८।

दारिद्र्यादि विषम काळातही सुख मानावे; मन प्रसन्न ठेवावे. पती दुःखात असेल तर आपण आनंद मानू नये. पती, सासू, सासरे इत्यादींच्या समोर उच्च आसनावर बसू नये, खेळू नये किंवा मोठ्याने हसू नये.५४. पतीला झोप लागल्यावर आपण झोपावे. पतीच्या नावाचा उच्चार करू नये. जेवणासाठी इतरांच्या घरी जाऊ नये. कुणाजवळही याचना करू नये.५५. नवऱ्याला उलट उत्तरे देणारी कुत्र्याच्या जन्माला जाते. सासू-सासऱ्यांची वंचना करणारी जन्मांतरी घुबडी होते. पतीला सोडून गोड खाणारी डुकराच्या किंवा घुबडाच्या जन्माला जाते.५६. पतीला रागाने बोलणारी जन्मांतरी मुकी होते. 'मला पतीने मारले' अशी चहाडी करणारी वाघीण होते. सवतीशी वैर करणारी दरिद्री होते. जारकर्म करणारी किड्याच्या जन्माला जाते.५७. पतीच्या मृत्यूनंतर सहगमन करावे किंवा विधवाधर्माने राहावे. विशेषतः पतीचे शव मिळत नसेल, किंवा स्त्री गरोदर असेल वा तिचे लहान मूल असेल तर सहगमन न करता विधवाधर्माचे पालन करावे.५८.

**शिरसो वपनं कार्यं भुवि शय्या सकृद्भुजिः । वर्ज्यास्ताम्बूलगन्धादि सुभोगा मंगलाप्लुतिः ।।५९।।**
**त्याज्याः सौभाग्योपचारा धार्यं गौरांशुकं सदा । राधमाघोर्जेषु कार्यं स्नानदानव्रतादिकम् ।।६०।।**
**शक्तौ चान्द्रायणं कार्यं भोज्यं वाज्यफलादिकम्। यत्प्रियं सति पत्यौ तद्देयं विप्राय भक्तितः ।।६१।।**
**मासव्रतं च कल्पोक्तं कार्यं यद्यत्तु वर्जितम् । देयं विप्राय चोष्णाम्बु तोषणीयस्तु तैर्थिकः ।।६२।।**

शिरसः वपनं कार्यं, भुवि शय्या, सकृत् भुजिः। ताम्बूल+गन्धादि, सुभोगा, मंगल+आप्लुतिः वर्ज्याः।५९। सौभाग्य+उपचाराः त्याज्याः। सदा गौर+अंशुकं धार्यम्। राध+माघ+ऊर्जेषु स्नान+दान+व्रतादिकं कार्यम्।६०। शक्तौ चान्द्रायणं कार्यम्। वा आज्य+फल+आदिकं भोज्यम्। पत्यौ यत् प्रियं सति तत् विप्राय भक्तितः देयम्।६१। कल्प+उक्तं मास+व्रतं च कार्यम्। यत् यत् तु वर्जितं उष्ण+अम्बु च विप्राय देयम्। तैर्थिकः तोषणीयः।६२।

**विधवाधर्मा**चे निरूपण करतात. डोक्यावरचे केस काढावेत. जमिनीवर झोपावे. रोज एक वेळच जेवावे. विडा, गंध, पुष्प इत्यादि छानछौकीच्या वस्तू सोडाव्या. मंगलस्नान करू नये.५९. हळदी-कुंकू इत्यादि सौभाग्य चिह्नांचा त्याग करावा. नेहमी पांढरे किंवा लाल वस्त्र नेसावे. वैशाख, माघ आणि कार्तिक या महिन्यांत स्नान, दान, व्रत इत्यादींचे आचरण करावे.६०. शक्ती असेल तर चांद्रायण करावे; किंवा तूप, फळे इत्यादींवर राहावे. पती असतांना जे पदार्थ आपल्या आवडीचे असतील ते ब्राह्मणाला भक्तीपूर्वक दान करावे.६१. कल्पांत (शास्त्रांत) सांगितलेले मासाचे व्रत विशिष्ट पदार्थ सोडणे, थंड पाण्याने स्नान करणे इत्यादि, आचरावे. जे जे आपण सोडलेले ते ते पदार्थ ब्राह्मणाला दान करावे. तसेच ब्राह्मणाला ऊन पाणी द्यावे. तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांना दानादिकांनी संतुष्टवावे.६२.

**पुत्रे तदाज्ञया स्थेयं सम्पूज्यः पतिवद्धरिः । गुरुगोऽतिथिसद्विप्राः पूज्यास्त्याज्यं कुभोजनम् ।।६३।।**
**हरिलीलारतिः कार्याऽपुत्रया पितृतर्पणम् । गोप्यं शीलं स्वकैः सार्धं तद्वैगुण्यादधोगतिः ।।६४।।**
**एतद्धर्माश्रयात्साध्वी दुर्गतिस्थमपि प्रियम् । प्रसह्योद्धृत्य चिल्लीव सर्पं स्वर्विशति ध्रुवम् ।।६५।।**
**लोपामुद्रे त्वत्ततोऽसौ सतीधर्मोऽत्र तारकः । एवं जीवोक्तधर्मस्ते मयोक्तः स्वेच्छयाचर ।।६६।।**

पुत्रे (सति) तत्+आज्ञया स्थेयम्। हरिः पतिवत् पूज्यः। गुरु+गो+अतिथि+सत्+विप्राः पूज्याः। कुभोजनं त्याज्यम्।६३। हरि+लीला+रतिः कार्या। अपुत्रया पितृ+तर्पणम् (कार्यम्)। शीलं गोप्यम्। तत्+वैगुण्यात् स्वकैः सार्धं अधोगतिः।६४। एतत्+धर्म+आश्रयात् साध्वी दुर्गतिस्थं अपि प्रियं चिल्ली सर्पं इव प्रसह्य उद्धृत्य ध्रुवं स्वः विशति।६५। (हे) लोपामुद्रे, त्वत्+ततः असौ सती+धर्मः तारकः। एवं जीव+उक्त+धर्मः मया उक्तः। स्व+इच्छया आचर।६६।

मुलगा असेल तर त्याच्या आज्ञेत राहावे. विष्णूची पतीभावाने पूजा करावी. गुरू, गोमाता, अतिथी आणि योग्य ब्राह्मण यांची पूजा करावी. कांदा, लसूण इत्यादि निषिद्ध पदार्थ खाऊ नयेत. कारण मनुस्मृतीनुसार (११:५६) ते सुरापानासमान आहेत. (*ब्रह्मोज्झं वेदनिन्दां च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः। गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट्।।*)६३. भगवंताच्या लीलांचे भक्तिपूर्वक श्रवण करावे. पुत्र नसेल तर पत्यादि त्रयी आणि पित्रादि त्रयींना उद्देशून तर्पण करावे. शीलाचे संरक्षण करावे. त्यांत वैगुण्य आले तर पूर्वजांसह आपण अधोगतीला जातो.६४. ह्या विधवाधर्माच्या आश्रय घेणारी साध्वी, पती नरकांत जरी असला तरी, घारीने सर्पाला ओढून आकाशांत न्यावे तसे त्याला तेथून बळाने खेचून काढून दीर्घकाल स्वर्गाला घेऊन जाते.६५. हा धर्म सांगून झाल्यावर बृहस्पती म्हणाले, 'लोपामुद्रे, तुझ्यासारख्या सतींपासून विस्तारलेला हा पतिव्रताधर्म खरोखर तारक आहे.' श्रीगुरू म्हणतात, 'बृहस्पतींनी प्रतिपादलेला हा धर्म मी तुला सांगितला. आतां तू तुला जे रुचेल तेच कर. पतीच्या मृत्यूनंतर जी नारी ब्रह्मचर्याचे पालन करते ती जरी निपुत्रिक असली तरी मनुस्मृतीत (५:१६०) तिला ब्रह्मचाऱ्यांप्रमाणे स्वर्गवासाचे फळ सांगितले आहे.' (*मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यं व्यवस्थिता। स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः।।*)६६.

**भेवार्कं पतिमन्वेहि रोचतेऽनुगमो यदि । स्वर्याति गौरवाद्येन प्रोद्धृत्येशं यमादपि ।।६७।।**
**प्रत्यङ्घ्य्रश्वक्रतुफलं कोट्यब्दं प्रतिरोमतः । स्वर्वासः सार्धत्रिकोटि-रोमहोमात्प्रियान्वितः ।।६८।।**
**रूपलावण्यसंपन्नाः स्त्रियः सन्ति गृहे गृहे । ताभिः किं कार्यमेकैव साध्वी त्रिकुलपावनी ।।६९।।**
**क्ष्मावातोऽर्कोऽग्निर्बिभेति स्वत्रासोऽस्या भवेदिति । तिष्ठन्ति प्रणता देवाः स्वपदच्युतिशङ्कया ।।७०।।**

यदि अनुगमः रोचते, अर्कं भा इव पतिं अन्वेहि। येन यमात् अपि ईशं प्रोद्धृत्य गौरवात् स्वः याति।६७। प्रति+अंघ्रि अश्वक्रतु+फलं, सार्धत्रिकोटि+रोम+होमात् प्रतिरोमतः प्रिया अन्वितः कोटि+अब्दं स्वः+वासः।६८। रूप+लावण्य+संपन्नाः स्त्रियः गृहे गृहे सन्ति। ताभिः किं कार्यम्? एक एव साध्वी त्रि+कुल+पावनी।६९। अस्याः स्व+त्रासः भवेत् इति क्ष्मा+वातः+अर्कः+अग्निः बिभेति। देवाः स्व+पद+च्युति+शंकया प्रणताः तिष्ठन्ति।७०।

'तुला जर सहगमनाची आवड असली तर, सूर्यासह जशी त्याची प्रभा जाते तशी तू पतीसह जा. त्यायोगे तू पतीला यमापासूनही बळाने खेचून, देवादिकांनी केलेल्या सत्कारपूर्वक स्वर्गांत जाशील.'६७. 'सहगमन करणारी स्त्री प्रत्येक पावलागणिक एकेका अश्वमेधाचे पुण्य मिळवीत असते. सती आपल्या शरीराच्या साडेतीन कोटी रोमांची आहुती देते. त्या प्रत्येक रोमासाठी एक ती एकेक कोटी वर्षे पतीसह स्वर्गांत वास करते.६८. सौंदर्य आणि लावण्य मिरविणाऱ्या स्त्रिया काय घरोघरी आहेत. त्यांना घेऊन काय करायचे? एक जरी पतिव्रता सती असली तरी ती पित्याच्या, मातेच्या आणि पतीच्या अशा तीन कुळांना पावन करते.६९. 'ह्या पतिव्रतेला आपल्यामुळे कष्ट तर होणार नाहीत ना?' अशा शंकेने पृथ्वी, वायू, सूर्य आणि अग्नी हे धास्तावलेले असतात. सर्वही देव तिने आपल्याला पदापासून काढू नये म्हणून हात जोडून नम्रतेने उभे असतात.७०.

**साध्व्या इयान्प्रभावोऽस्ति धन्यैषा पितृतारका । धिग्दुःशीलामधःशेते या चिरं त्रिकुलैः समम् ।।७१।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**वैधव्यपालनं कष्टं तारुण्याद्यत्र घातकम् । प्रीतिर्धवानुगमने नूनं मे वर्धते गुरो ।।७२।।**

**।। साधुरुवाच ।।**

**साधु साध्वि तदिष्टं ते मा शुचो दैवमुन्नतम् । आयुष्मद्भीष्मपौलस्त्य-मुखाः कालवशं गताः ।।७३।।**
**कालोऽजय्योऽमरैश्चापि दुर्धरः सद्गुरुं विना । गुरुदर्शनकामाप्ता दूरात् तत् त्वं समाचर ।।७४।।**

'साध्व्या इयान् प्रभावः अस्ति। एषा पितृतारका धन्या। या त्रिकुलैः समं चिरं अधः शेते (तां) दुःशीलां धिक्।७१। साध्वी उवाच। वैधव्य+पालनं कष्टम्। अत्र तारुण्य आदि घातकम्। (हे) गुरो मे धव+अनुगमने प्रीतिः वर्धते।७२। साधुः उवाच। 'साधु! (हे) साध्वि तत् ते इष्टम्। मा शुचः। दैवं उन्नतम्। आयुष्+मत्+भीष्म+ पौलस्त्य+मुखाः कालवशं गताः।'७३। 'कालः अमरैः अपि अजय्यः। सद्गुरुं विना दुर्धरः। त्वं दूरात् गुरु+दर्शन+काम+आप्ता। तत् समाचर।७४।

'एवढा साध्वीचा प्रभाव असतो. सर्व पितर तारणारी ती पतिव्रता खरोखरच धन्य होय. तिच्या उलट तिन्ही कुळांना दीर्घ नरकवासाला घेऊन जाणाऱ्या दुर्वर्तनी स्त्रीचा धिक्कार करावा तेवढा थोडाच आहे.'७१. त्या तापसाचे बोलणे ऐकून ती साध्वी म्हणाली, 'विधवेच्या धर्माचे आचरण फारच कष्टप्रद वाटते. शिवाय माझे तारुण्यादि माझ्या घाताला कारण होण्याची भीती वाटते. गुरुमहाराज, हा सर्व विचार करून मला पतीच्या मागे सहगमन करण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे.'७२. साधू म्हणाले, 'छान बोललीस! तेच तुझ्या कल्याणाचे आहे. शोक करू नकोस. दीर्घायुषी म्हणविलेले भीष्म आणि रावण आदिसुद्धा मृत्यूचे ग्रास झालेच ना?७३. काळ हा देवादिकांनासुद्धा अजिंक्य आहे. सद्गुरूंवाचून त्याचा सामना करणे अशक्य आहे. तू लांबून श्रीगुरुदर्शनाच्या इच्छेने आली आहेस तर ते तू कर.'७४.

**स्नात्वा पीताम्बरं धृत्वा प्रायश्चित्तपुरःसरम् । सौभाग्यवायनान्यङ्ग सपत्नीकद्विजेभ्य इत् ।।७५।।**
**दत्वा श्रुत्योर्गले चेमान् बध्वाक्षान्भस्म मस्तके । लिप्त्वाङ्गं गुरुपादाद्भिः प्रोक्ष्येशमनुयाह्यिये ।।७६।।**
**इत्युक्त्वा भस्मरुद्राक्षान् दत्वागात्सोऽपि सा द्विजान् । आहूयादात्सुसौभाग्य-दानानि बहुशो मुदा ।।७७।।**
**प्राहानुगान्यात गृहमुमेशौ पितरौ मम । यास्ये तत्रात्र हर्षात्स्वरिति वाच्यं गुरून्प्रति ।।७८।।**
**इत्युक्त्वा नीयमानस्य पत्युरग्निकराग्रतः । गच्छन्ती मन्थरोमेव रेजे मुद्रूपिणी सती ।।७९।।**

'(हे) अङ्ग, स्नात्वा, पीताम्बरं धृत्वा सपत्नीक+द्विजेभ्यः सौभाग्य+वायनानि दत्वा,।७५। इमान् अक्षान् श्रुत्योः गले च बध्वा, मस्तके भस्म लिप्त्वा, ईशं गुरु+पाद+अद्भिः प्रोक्ष्य अनुयाह्यहि।७६। इति उक्त्वा भस्म+रुद्राक्षान् दत्वा सः अगात्। सा अपि द्विजान् आहूय मुदा बहुशः सौभाग्य+दानानि अदात्।७७। अनुगान् प्राह, गृहं यात। उमा+ईशौ मम पितरौ, तत्र यास्ये। अत्र हर्षात् स्वः इति गूरून् प्रति वाच्यम्।७८। इति उक्त्वा नीयमानस्य पत्युः अग्रतः अग्निकरा मन्थरा गच्छन्ति सती उमा इव रेजे।७९।

'बाळे, स्नान करून पीतांबर धारण करून ब्राह्मणांना व सुवासिनींना सौभाग्याची वाणे देऊन,७५. हे रुद्राक्ष पतीच्या कानांत व गळ्यांत बांधून, त्याच्या कपाळावर भस्म लेपून, श्रीगुरूंच्या पायाचे तीर्थ त्याच्यावर शिंपून मग तू सहगमन कर.'७६. असे बोलून आणि भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन तो तापसी आपल्या वाटेने निघून गेला. त्या साध्वीनेही मग ब्राह्मणांना सपत्नीक बोलावून आनंदाने विपुल सौभाग्य वस्तूंचे दान केले.७७. आपल्या सोबत आलेल्या लोकांना तिने बोळवले. म्हणाली, 'गांवाकडे घरी जा. शिव आणि पार्वती हेच माझे मातापिता आहेत. आम्ही त्यांच्याकडे जातो. आम्ही उभयतां इथे आनंदांत आहोत असे माझ्या सासू-सासऱ्यांना सांगा.'७८. असे बोलून स्मशानाकडे चालविलेल्या पतीच्या प्रेतापुढे अग्नी हातांत घेऊन हळूहळू जाणारी ती सती साक्षात् पार्वतीप्रमाणे शोभत होती.७९.

**भर्तृसौख्यानभिज्ञेयं षोडशाब्दातिसुंदरी । कुलोद्धर्त्री सुधन्येति स्तूयमाना जनैर्ययौ ॥८०॥**
**श्मशानमेत्य संस्कृत्य कुण्डेऽग्निं वायनादिभिः । सुवासिनीस्तोषयित्वा सस्मार गुरुभाषितम् ॥८१॥**
**लिप्त्वाङ्गे भस्म बध्वाक्षान् पत्युर्विप्राज्ञया गुरुम् । द्रष्टुकामा ययौ साध्वी संगमं तं स्तुवन्त्यजम् ॥८२॥**
**दाता सर्वेश्वरस्त्वं शरणमपि सतां त्र्यात्मको विश्वसर्ग-**
**स्थित्यन्तानां निदानं ततबिरुदचयः श्रीहरिस्त्वं दयाब्धिः ।**
**मत्तुल्यास्त्वत्कृपांशात्सुपतिसुतसुखाः सन्ति नार्योऽज यास्ये**
**स्वर्भूत्वा पूर्णकामा पतिसुतमुदिता कीर्तिमादाय तेऽद्य ॥८३॥**

भर्तृ+सौख्य+अनभिज्ञा इयं षोडश+अब्दा अतिसुंदरी कुल+उद्धर्त्री सुधन्या इति जनैः स्तूयमाना ययौ।८०। श्मशानं एत्य, कुंडे अग्निं संस्कृत्य, वायनादिभिः सुवासिनीः तोषयित्वा गुरु+भाषितं सस्मार।८१। पत्युः अङ्गे भस्म लिप्त्वा, अक्षान् बध्वा, गुरुं द्रष्टु+कामा साध्वी विप्र+आज्ञया, तं अजं स्तुवन्ति संगमं ययौ।८२। 'त्वं सतां अपि शरणं त्रि+आत्मकः विश्व+सर्ग+स्थिति+अंतानां निदानं सर्वेश्वरः तत+बिरुद+चयः श्रीहरिः दाता दया+अब्धिः। '(हे) अज, मत्+तुल्याः त्वत्+कृपा+अंशात् सुपति+सुत+सुखाः नार्यः सन्ति। अद्य पूर्ण+कामा पति+सुत+मुदिता ते कीर्तिं आदाय स्वः यास्ये।'८३।

'पहा हो ही सोळा वर्षांची सुकुमार सुंदर मुलगी, जिला पतिसुख म्हणजे काय हेसुद्धा ठाउक नाही, सहगमन करून कुळांचा उद्धार करते आहे. ही खरोखर धन्य धन्य आहे,' अशी लोकांची स्तुतिसुमने ऐकत ती जात होती.८०. स्मशानांत येऊन कुंडांतील अग्नीवर संस्कार करून तिने सुवासिनींना वाणे दिली आणि तिला गुरूंचे भाषण आठवले.८१. त्यांनी सांगितल्याप्रमाणे पतीच्या शरीराला भस्म लावून त्याच्या गळ्यात आणि कानांत रुद्राक्ष बांधले आणि सद्गुरूंच्या दर्शनाच्या इच्छेने ब्राह्मणांच्या परवानगीने ती त्या परमात्म्याची स्तुती करीत संगमाकडे निघाली.८२ त्या सतीच्या स्तुतीत सद्गुरूंवर परमेश्वरासारखी निष्ठा आहेच; पण तिचे दुःख, घोर निराशाही आहेत. सर्वसामर्थ्यशाली सद्गुरूंसमोर हे सर्व भाव व्यक्त करतांना तिने उपरोधाचाही अवलंब केला आहे. त्यामुळे ही स्तुती अत्यंत हृदयस्पर्शी झाली आहे.८३.

**मृतो जीवितो रुग्ण आरोग्यमाप्तो गतः शर्म भीतोऽपि दीनोऽर्थयुक्तः ।**
**गतः प्राज्ञतामज्ञ ईश प्रभावात्तवाहं धवाढ्याद्य सायुज्यमेष्ये ।।८४।।**
**एवं स्तुवन्ती पथि साञ्जनाश्रुलीढस्तनस्वर्णघटा हठात्स्वाम् ।**
**उद्धर्तुकामापि समं धवेन जवेन सागत्य हरिं ननाम ।।८५।।**
**आयान्तीं प्रणतां देवस्त्वं सौभाग्यवती भव । अष्टपुत्रा पुनश्चेति भगवान्प्रीत आह ताम् ।।८६।।**

'(हे) ईश, तव प्रभावात् मृतः जीवितः, रुग्णः आरोग्यं आप्तः, भीतः अपि शर्म गतः, दीनः अर्थ+युक्तः, अज्ञः प्राज्ञतां गतः। अद्य धव+आढ्या सायुज्यं एष्ये।'८४। एवं स्तुवन्ती स+अञ्जन+अश्रु+लीढ+स्तन+स्वर्ण+घटा हठात् स्वां धवेन समं उद्धर्तु+कामा अपि सा जवेन आगत्य हरिं ननाम।८५। देवः आयान्तीं प्रणतां तां 'त्वं सौभाग्यवती भव' इति आह। पुनः 'अष्ट+पुत्रा' इति च भगवान् प्रीतः आह।८६।

'हे भगवंता, तू साधूंचा आणि धर्माचा त्राता आहेस. तूच ब्रह्मा-विष्णू-शिव या तीन रूपांनी विश्वाच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचा कर्ता आहेस, कारण तूच सर्वांचा ईश्वर आहेस. तुझी बिरुदावली त्रैलोक्यांत पसरलेली आहे. तूच श्रीहरी आणि तूच दयासागर दाता आहेस. तुझ्या कृपालेशाने किती तरी स्त्रियांना पती आणि पुत्र यांचे सुख लाभलेले आहे. आज मीसुद्धां पती आणि पुत्र यांचे सुखाने हर्ष पावून पूर्णकाम झाले आहे; आणि तुझी कीर्ती घेऊन स्वर्गाला जाते आहे!८४. 'देवा रे, तुझ्या प्रभावाने मेलेलाही (माझा पती) जिवंत झाला, रोग्याला आरोग्य मिळाले, आर्ताला सुख मिळाले, दरिद्री धनवान झाला आणि अज्ञानीही ज्ञानवान् झाला. आज मी पतीसह मी तुझे सायुज्य प्राप्त करीत आहे!८५. अशी उपरोधात्मक स्तुती करीत, काजळाने काळवंडलेल्या अश्रूंनी आपले सोन्याच्या घटासारखे स्तन भिजवीत, आपल्या व पतीच्या उद्धाराच्या तीव्र इच्छेने, वेगाने श्रीगुरूंसमोर येऊन तिने त्यांना नमस्कार केला. आपल्या समोर येऊन नमस्कार करणाऱ्या त्या सतीला पाहून श्रीगुरुदेव 'तूं सौभाग्यवती हो', असे म्हणाले; तसेच पुन्हा प्रेमाने 'अष्टपुत्रा हो' असेही म्हणाले.८६.

**तच्छुत्वा चकिता लोकाः शशंसुः सर्वमादितः । प्रभुः प्राह न मे वाक्यं मोघं शवमिहानय ।।८७।।**
**अत्रान्तरे द्विजा एत्य रौद्र्यानर्चुर्गुरुं तदा । आनीतं शवमुद्वीक्ष्य सुधादृष्ट्या स्वसंनिधौ ।।८८।।**
**स्थापयित्वा स तं रौद्र-मन्त्रिताद्भिस्तनुं समाम् । स्नापयामास सोऽकस्मात् सुप्तोत्थितवदुत्थितः ।।८९।।**
**तदा हर्षाश्रुपूर्णाक्षी लज्जितं विस्मितं पतिम् । प्रेम्णा शशंस तत्सर्वमूचतुः प्राञ्जली उभौ ।।९०।।**

तत् श्रुत्वा चकिताः लोकाः सर्वं आदितः शशंसुः। प्रभुः प्राह, 'मे वाक्यं मोघं न। शवं इह आनय।'८७। अत्र+अंतरे द्विजा एत्य गुरुं रौद्र्यान् अर्चुः। तदा आनीतं शवं सुधा+दृष्ट्या उद्वीक्ष्य तं स्व+संनिधौ।८८। स्थापयित्वा, सः समां तनुं रौद्र+मंत्रित+अद्भिः स्नापयामास। सः अकस्मात् सुप्त+इत्थित इव उत्थितः।८९। तदा लज्जितं विस्मितं पतिं हर्ष+अश्रु+पूर्ण+अक्षी तत् सर्वं प्रेम्णा शशंस। उभौ प्राञ्जलिः ऊचतुः।९०।

ते ऐकून विस्मित झालेल्या लोकांनी श्रीगुरूंना पहिल्यापासून सर्व हकीकत सांगितली. प्रभू म्हणाले, 'माझे वचन कधीच निष्फल होत नाही. ते प्रेत इथे घेऊन या.'८७. इतक्यात ब्राह्मणांनी येऊन श्रीगुरूंची रुद्रमंत्रांनी पूजा केली. तोपर्यंत लोकांनी आणलेल्या प्रेतावरून आपली अमृतदृष्टी फिरवून ते शव आपल्याजवळ ठेवायला लावले,८८. आणि त्याला रौद्रमंत्रांनी अभिमंत्रित केलेल्या जलाने स्नान करविले. त्या वेळी तो सतीचा मृत पती झोपेतून उठावा तसा अकस्मात् उठून बसला.८९. तेव्हां सर्व लोकांना लाजणाऱ्या आणि विस्मित झालेल्या आपल्या पतीला त्या सतीने आनंदाश्रूंनी पाणावलेल्या डोळ्यांनी सर्व कांही सांगितले. त्या वेळी त्या दोघांनीही हात जोडून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली.९०.

**आवां स्वो दुर्धियौ पापौ भवत्स्मृतिपरायुखौ । तथापि त्वं दयासिन्धो सच्चिदानन्द हंसि नो ।।९१।।**
**जगद्गुरो विश्वमूर्ते परमात्मन्त्राहि विश्वप । विश्वसाक्षिन्विश्वसंस्थ सर्वानन्दनिधे हरे ।।९२।।**
**कर्ताऽकर्ताऽन्यथाकर्ता त्वमेवासि पुमर्थदः । आवाभ्यामपराद्धं तत् क्षामये त्वाद्य कात्स्न्र्यतः ।।९३।।**
**एवं तौ बहुशो नत्वा प्रणतीश्चक्रतुर्मुदा । तच्चित्रं प्रेक्ष्य लोकोऽपि तुष्टाव परमेश्वरम् ।।९४।।**

'आवां दुर्धियौ, पापौ, भवत्+स्मृति+पराङ्मुखौ स्वः। तथापि (हे) दया+सिन्धो (हे) सच्चिदानंद, त्वं नो हंसि।'।९१। '(हे) जगद्+गुरो, विश्व+मूर्ते, परमात्मन्, विश्व+प, विश्व+साक्षिन्, विश्व+संस्थ, सर्व+आनन्द+निधे, हरे, त्राहि।९२। त्वं एव कर्ता, अकर्ता, अन्यथा+कर्ता, पुं+अर्थदः असि। आवाभ्यां अपराद्धं तत् अद्य त्वां कात्स्न्र्येन क्षामये।'९३। एवं तौ बहुशः मुदा नत्वा प्रणतीः चक्रतुः। तत् चित्रं प्रेक्ष्य लोकः अपि परमेश्वरं तुष्टाव।९४।

'आम्ही पापी आणि दुष्ट बुद्धीचे असून तुझ्या स्मरणालाही विमुख आहो. तरी हे दयासागरा, सच्चिदानंदा, तू आमचा घात न करता रक्षणच करतोस.'९१. 'अहो जगद्गुरो, विश्व हेच ज्यांचे मूर्त स्वरूप आहे अशा परमात्मा, जगाचे पोषण करणाऱ्या, जगत्साक्षी, जगच्या अधिष्ठाना, सर्व आनंदाच्या निधाना, हरे, आमचे रक्षण कर.९२. तूच कर्ता, अकर्ता, अन्यथाकर्ता तसेच सर्व पुरुषार्थांचा दाता आहेस. आमचे उभयतांच्या सर्वही अपराधांची आज क्षमा मागते.' (एकवचनी क्रियापदाच्या योजनेवरून ही क्षमायाचना ती सती करते आहे असे समजावे.)९३. अशा तऱ्हेने त्या दंपतीने श्रीगुरूंना आनंदभराने वारंवार वाकून अनेक वेळा नमस्कार केला. हा चमत्कार पाहून तिथे जमलेल्या लोकांनीही श्रीगुरुदेवांची स्तुती केली.९४.

**तत्रैको धूर्त आहेशं केऽस्ति ब्रह्मलिपिर्न वा । नाल्पो मृत्युर्महानेष सास्ति चेज्जीवितः कुतः ॥९५॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**धात्रात्र लिखितं त्रिंशदायुरेष्यभवे शतम् । याच्ञयैष्यं शतं त्वत्र गृहीत्वा व्यस्तमाचरम् ॥९६॥**

**तच्छ्रुत्वा मिलिता लोका उच्चैश्चक्रुर्जयध्वनिम् । स्वर्वासिश्रोत्रविवर-विश्रान्तिमघमर्षणम् ॥९७॥**

**दम्पती प्राह भगवानायुष्मन्तौ निरामयौ । सुपुत्रधनकीर्त्याढ्यौ लोकवन्द्यौ भविष्यतः ॥९८॥**

तत्र एको धूर्तः ईशं आह। के ब्रह्म+लिपिः अस्ति वा न? एष मृत्युः अल्पः न, महान (अस्ति)। (लिपिः) अस्ति चेत् सः कुतः जीवितः?९५। श्रीगुरुः उवाच । अत्र धात्रा त्रिंशत् आयुः लिखितम्। एष्य+भवे शतम्। अत्र तु याच्ञया एष्यं शतं गृहीत्वा व्यस्तं आचरम्।९६। तत् श्रुत्वा मिलिता लोकाः उच्चैः स्वः+वासि+श्रोत्र+विवर+विश्रान्तिं अघमर्षणं जय+ध्वनिं चक्रुः।९७। भगवान दम्पती प्राह, 'आयुष्मन्तौ, निरामयौ, सुपुत्र+धन+कीर्ति+आढ्यौ लोक+वन्द्यौ भविष्यतः।'९८।

तिथे एक धूर्त (चिकित्सक, बुद्धिवादी) होता. तो श्रीगुरूंना म्हणाला, 'कपाळावर ब्रह्मदेवाचा लेख असतो की नाही? हा कांही टाळता येण्यासारखा अल्प मृत्यू नव्हता. दीर्घकाळ क्षयानंतर आलेला हा मृत्यू महान - काळमृत्यूच असला पाहिजे. जर ब्रह्मदेवाने हेच त्याच्या कपाळी लिहिले असेल तर कसा जिवंत झाला?'९५. श्रीगुरूंच्या अघटितघटनापटुत्वाची एवढी प्रत्यक्ष प्रचीती आलेली असूनही श्रद्धेच्या अभावी त्याने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर श्रीगुरू त्याच्याच भाषेत देत आहेत. ते म्हणाले, 'खरे आहे, ब्रह्मदेवाने या जन्मात याला तीस वर्षेच आयुष्य लिहिलेले आहे. पण पुढच्या जन्मात शंभर वर्षे आयुष्य लिहिलेले आहे. ते मागून घेऊन आम्ही या जन्मात शंभर व पुढच्या जन्मात तीस अशी अदलाबदल केली आहे.'९६. ते ऐकून तिथे जमलेल्या लोकांनी जो पापनाशक जयजयकार केला तो स्वर्गांतील देवांच्या कर्णरंध्रांत जाऊनच विसावला.९७. श्रीगुरू भगवान त्या दंपतीला म्हणाले, 'तुम्ही दीर्घायुषी, आरोग्यसंपन्न, पुत्रवान, धनसंपन्न, कीर्तिमान होऊन लोकांत पूज्यता पावाल.'९८.

**श्रुत्वा गुरोर्गां प्रमुदान्वितावुभौ स्नात्वा गुरोश्चक्रतुरर्चनं तदा ।**
**अस्तं गतोऽर्कोऽप्यज आह्निकीं क्रियां कृत्वा मठं सर्वजनैः सहाययौ ।।९९।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे मृतसंजीवनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

**आदितः षोडशोऽध्यायः ।।१६।। ।। श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ।। ।। श्रीगुरुदेव दत्त ।।**

गुरोः गां श्रुत्वा तौ उभौ प्रमुदितान् स्नात्वा गुरोः अर्चनं चक्रतुः। तदा अर्कः अपि अस्तं गतः। अजः आह्निकीं क्रियां कृत्वा सर्वजनैः सह मठं आययौ।९९।

हे श्रीगुरूंचे आशीर्वचन हे ऐकून त्या दंपतीला अत्यंत हर्ष झाला. त्यांनी स्नान करून श्रीगुरूंचे पूजन केले. एवढ्यांत सूर्यही अस्तमानाला गेला. श्रीगुरूंनीही सायंकाळचे आह्निक केले आणि सर्व लोकांसह मठांत परतले.९९.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला तिसरा आणि प्रथमपासून सोळावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। सप्तदशोऽध्यायः ।।

### ।। सिद्ध उवाच ।।

**अन्येद्युराह साध्वीशं पूर्वेद्युः कश्चनैत्य सन् । तत्त्वज्ञानेन माश्वास्य भस्माक्षान्चतुरो ददौ ।।१।।**
**प्राह दृष्ट्वा गुरूं तीर्थैः पतिं प्रोक्ष्यानुयाहि तम् । इत्युक्त्वागात्स कस्तीर्थ-रुद्राक्षमहिमा कियान् ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**रूपान्तरेण ते भावो मयैवाङ्ग परीक्षितः । धन्यासि सुभगे साध्वि तीर्थाक्षमहिमा त्वियान् ।।३।।**

सिद्ध उवाच। अन्येद्युः साध्वी ईशं आह। पूर्वेद्युः कश्चन सन् एत्य मां तत्त्वज्ञानेन आश्वास्य भस्म (एवं) चतुरः अक्षान् ददौ।१। (सः) प्राह, गुरुं दृष्ट्वा पतिं तीर्थैः प्रोक्ष्य तं अनुयाहि। इति उक्त्वा अगात्। सः कः? तीर्थ-रुद्राक्ष+महिमा कियान्?२। श्रीगुरुः उवाच। (हे) अङ्ग, मया एव रूपान्तरेण ते भावः परीक्षितः। (हे)साध्वि, सुभगे, धन्या असि! तीर्थ+अक्ष+महिमा तु इयान्।३।

श्रीगणेशाय नमः। *रुद्राक्षाचे आणि भस्माचे माहात्म्य सतरावीं सतीप्रती। मंत्रोपदेशाचा न अधिकार स्त्रियांना म्हणुनी सोमवारव्रत उपदेशिती।।* सिद्ध पुढे नामधारकाला सांगतात. दुसऱ्या दिवशी त्या साध्वीने श्रीगुरूंना विचारले, 'काल कुणी एक साधूंनी येऊन माझे तत्त्वज्ञानाच्या उपदेशाने सांत्वन केले आणि मला भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन (१) सांगितले की, 'श्रीगुरूंचे दर्शन घेऊन त्यांचे पादतीर्थ पतीच्या शवावर शिंपून मग तू सहगमन कर.' ते साधू कोण होते? आणि त्या रुद्राक्षांचा तसेच तीर्थाचा काय महिमा आहे?२. श्रीगुरू म्हणाले, 'हे बाळे, मीच दुसऱ्या रूपाने तुझ्या भक्तीची परीक्षा पाहिली. हे भाग्यवती साध्वी, तू खरेच धन्य आहेस! रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा असा आहे.'३.

**तन्माहात्म्यं कोऽत्र वक्ति भूषेशस्यामृतत्वदा । नृणामेकादिवक्त्राक्षा गङ्गास्नानादिपुण्यदाः ॥४॥**
**वराः स्युर्धातुरत्नाढ्याः शिव एव सहस्रधृक् । नाक्षैर्विना पुण्यलब्धिः पापनाशोऽक्षधारणात् ॥५॥**
**ईशनामाक्षभस्माढ्यो दुर्धरो मरुतामपि । जपेऽक्षाः प्राज्यफलदा ना भस्माक्षैर्विना पशुः ॥६॥**
**दन्ताभ्राब्ध्यर्कनृपभू-क्ष्मार्काष्टाशोन्मिताक्षतः । कण्ठकश्रुतिदोश्चूडा-दृक्करोरांसि भूषयेत् ॥७॥**

तन्+माहात्म्यं अत्र कः वक्ति ? ईशस्य अमृतत्वदा भूषा। नृणां एकादि+वक्त्र+अक्षाः गङ्गा+स्नान+आदि पुण्यदाः।४। धातु+रत्न+आढ्याः वराः स्युः। सहस्रधृक् शिव एव। अक्षैः विना पुण्य+लब्धिः न। अक्ष+धारणात् पापनाशः।५। ईश+नाम+अक्ष+भस्म+आढ्यः मरुतां अपि दुर्धरः। जपे अक्षाः प्राज्य+फलदाः। भस्म+अक्षैः विना ना पशुः।६। दन्त+अभ्र+अब्धि+अर्क+नृप+भू+क्ष्मा+अर्क+अष्टाशोन्मित अक्षतः कण्ठ+क+श्रुति+दोः+चूडा+दृक्+कर+ऊर+अंसि भूषयेत्।७।

भगवान शंकरही ज्या रुद्राक्षांना भूषण म्हणून धारण करतात अशा मोक्षप्रद रुद्राक्षांचे माहात्म्य कोणाला बरे सांगता येईल? एकमुखी, पंचमुखी, एकादशमुखी, चतुर्दशमुखी इत्यादि प्रकारचे रुद्राक्ष गंगास्नानादिकांचे पुण्य देतात.४. सुवर्णादि धातूंनी किंवा रत्नांनी मढविलेले रुद्राक्ष उत्तम होत! एक हजार रुद्राक्ष धारण करणारा पुरुष शिवसदृश होतो. रुद्राक्ष धारण न करता कुठलेही पुण्य घडत नाही. केवळ रुद्राक्ष घातल्याने पापांचा क्षय होतो.५. मुखांत शिवनाम, शरीरावर रुद्राक्ष आणि अगावर भस्म धारण करणारा देवांनासुद्धा अजेय आहे. रुद्राक्षाच्या माळेने जप केल्यास अनंत फळ मिळते. भस्म आणि अक्ष रहित पुरुषही पशूसमानच होय.६. ३२ (*दंत*) रुद्राक्ष गळ्यांत, २४ (*अभ्राब्धि*) मस्तकावर, १२ (*अर्क*) कानांवर, १६ (*नृप*) बाहूंवर, १ (*भू*) शेंडीला, १ (*क्ष्मा*) डोळ्यांच्या मधे - भ्रूमध्यावर डोक्यावरून दोऱ्याने बांधून सोडलेला, १२ (*अर्क*) हातांवर आणि एकशे आठ रुद्राक्षांची माळ छातीवर याप्रमाणे धारण करावेत.७.

**काश्मीरे भद्रसेनस्य सुतस्तन्मन्त्रिणोऽप्युभौ । भूषां मत्वाश्मवत्स्वक्षान् बाल्येऽपि दधतुर्मुदा ।।८।।**
**शाक्त्यो राजाग्रहात्प्राह तद्धेतुं शृणु भूपते । नन्दिग्रामे पुरा तन्वी वारमुख्येन्दुभा सती ।।९।।**
**गजाश्वधनदाराढ्या धर्मज्ञा दानतत्परा । तन्नाट्यमण्डपे त्वेतौ साक्षौ मर्कटकुक्कुटौ ।।१०।।**
**शिवोऽस्या वैश्यरूपेण पातिव्रत्यं परीक्षितुम् । धृत्वाप कङ्कणं लिङ्गं भास्वद्वेश्याऽब्रवीत्सखीम् ।।११।।**

काश्मीरे भद्रसेनस्य सुतः, तत्+मंत्रिणः अपि, उभौ भूषां अश्मवत् मत्वा बाल्ये अपि सु+अक्षान् मुदा दधतुः।८। शाक्त्यः राज+आग्रहात् तत् हेतुं प्राह। (हे) भूपते, पुरा नन्दिग्रामे इन्दु+भा सती वारमुख्या (अभूत्)।९। (सा) गज+अश्व+धन+दारा+आढ्या धर्मज्ञा, दानतत्परा। तत् नाट्य+मंडपे तु एतौ स+अक्षौ मर्कट+कुक्कुटौ।१०। शिवः अस्य पातिव्रत्यं परीक्षितुं वैश्यरूपेण कङ्कणं (च) भास्वत् लिङ्गं धृत्वा आप। वेश्या सखीं अब्रवीत्।११।

रुद्राक्षमाहात्म्याची कथा सांगत आहेत. काश्मीरचा राजा भद्रसेन याचा मुलगा तसेच त्याच्या मंत्र्याचाही मुलगा ह्या दोघांनाही लहानपणापासून अलंकारांची नावड होती. ते त्यांना दगडासारखे वाटायचे. मात्र चांगले चांगले रुद्राक्ष मिळवून ते मोठ्या आवडीने धारण करीत.८. भद्रसेन राजाकडे एकदा पराशर ऋषी आले. राजाने वारंवार आग्रह केल्याने त्यांनी त्याला त्या बालकांच्या ह्या जगावेगळ्या वर्तनाचे कारण सांगितले. ते म्हणाले, ‘पूर्वी नन्दिग्राम नावाच्या गावी एक सद्वर्तनी वेश्या राहत होती.९. ती हत्ती, घोडे, पैसा दास, दासी इत्यादींनी संपन्न असून धर्म जाणणारी, त्याप्रमाणे वागणारी आणि दानतत्पर होती. तिच्या रंगमहालांत तिने पाळलेले हे दोघे माकड आणि कोंबडा रुद्राक्षांनी सजविलेले होते.१०. ती वेश्या असूनही स्वतःला पतिव्रता मानत असे; आणि पातिव्रत्यधर्माचे पालन करीत असे. एकदा तिच्या पातिव्रत्याची परीक्षा पाहण्यासाठी भगवान शंकर एका व्यापाऱ्याचे रूप घेऊन हातांत कङ्कण आणि तेजस्वी शिवलिंग धारण करून तिथे आले. त्यांना घरापुढून जाताना पाहून वेश्या आपल्या सखीला म्हणाली.११.

**परिपृच्छैनमर्घाच्चेद् रत्या वा दास्यति त्र्यहम् । साध्वीत्वेन वधूर्भूत्वा रमयाम्यस्मि पद्मिनी ।।१२।।**
**श्रुत्वोचे स तथा पृष्टं स्वैरिण्यां सत्यता कुतः । युष्माकं कुलधर्मस्तु व्यभिचारो हि केवलम् ।।१३।।**

**।। वेश्योवाच ।।**

**न स्वैरिणीयं साध्व्येव लिङ्गं तत्र प्रमा खलु । अहं त्र्यहं सतीत्वेन भजे त्वां सर्वभावतः ।।१४।।**

**।। वैश्य उवाच ।।**

**गृहाणेदं पुष्पवन्तौ साक्षिणावत्र मेऽसुवत् । स्ववाक्यं दृढभक्त्यैव विचारय पुनः पुनः ।।१५।।**

'एनं परिपृच्छ अर्घात् रत्या वा (इदं लिङ्गं) दास्यति चेत् अहं त्रि+अहं तस्य साध्वीत्वेन वधूः भूत्वा रमयामि। पद्मिनी अस्मि।'१२। तथा पृष्टं श्रुत्वा सः ऊचे, 'स्वैरिण्यां सत्यता कुतः? युष्माकं कुलधर्मः तु केवलं व्यभिचारः।'।१३। वेश्या उवाच। 'इयं न स्वैरिणी, साध्वी एव। तत्र लिङ्गं प्रमा खलु। अहं त्रि+अहं त्वां सर्वभावतः सतीत्वेन भजे।'१४। वैश्य उवाच, 'इदं मे असुवत् गृहाण। अत्र पुष्पवन्तौ साक्षिणः। स्ववाक्यं दृढ+भक्त्या एव पुनः पुनः विचारय।'१५।

'या व्यापाऱ्याला विचारा की त्याचे ते शिवलिंग तो विकत किंवा संभोगाच्या मोबदल्यांत देईल कां? तसे असेल तर मी तीन दिवस त्याची पत्नी होईन आणि पातिव्रत्याने त्याला सुखवीन. मी पद्मिनी आहे.' (*पद्मिनी* म्हणजे कामशास्त्रानुसार उत्तम स्त्री.)१२.

त्या व्यापाऱ्याला तसे विचारले असता तो म्हणाला, 'तुम्हा स्वैराचारी वेश्यांचे बोलणे कसे खरे मानायचे? व्यभिचार हाच तर तुमचा कुळाचार आहे.'१३. ती वेश्या म्हणाली की, 'मी स्वैरिणी नसून खरोखर साध्वीच आहे. या लिंगाची भाक घेऊन सांगते की मी तीन दिवसपर्यंत तुमची एकनिष्ठ पत्नी म्हणून राहीन.'१४. तो वैश्य म्हणाला, 'ठीक आहे तर! हे माझे प्राणप्रिय लिंग सूर्य आणि चंद्रांना साक्षी ठेवून घे. आपल्या वचनावर दृढ भक्तीने वारंवार विचार कर!'१५.

**इत्युक्त्वा तत्करे बध्वा कङ्कणं लिङ्गमर्पयत् । साध्वीत्वेनापि सा भेजे लिङ्गं संस्थाप्य मण्डपे ।।१६।।**
**सलिङ्गो मण्डपो दग्धोऽग्निनाकस्माद्रतिक्षणे । सकीशकुक्कुटो वैश्यो जुहावाग्नौ तनुं तदा ।।१७।।**
**वेश्याऽपि भर्तृनाशार्ता कुलाचारविरुद्धताम् । मा भजेति निषिद्धाऽपि स्वैः सिद्धानुगमेऽभवत् ।।१८।।**
**दत्वा दानानि नत्वार्कं ध्यात्वेशं वह्निमाविशत् । प्रादुर्भूतस्तदा त्र्यक्षः पञ्चास्यः प्राह पङ्क्तिदोः ।।१९।।**
**मायामुद्भाव्य ते सर्वं मयेशेन परीक्षितम् । वारमुख्यापि साध्वी त्वं प्रीतोऽस्मि वरयेप्सितम् ।।२०।।**

इति उक्त्वा तत्+करे कङ्कणं बध्वा लिङ्गं अर्पयत्। सा अपि लिङ्गं मण्डपे संस्थाप्य (तं) साध्वीत्वेन भेजे।१६। रतिक्षणे अकस्मात् स+कीश+कुक्कुटः सलिङ्गः मंडपः अग्निना दग्धः। तदा वैश्यः अग्नौ तनुं जुहौ।१७। वेश्या अपि भर्तृ+नाश+आर्ता, स्वैः 'कुलाचार+विरुद्धतां मा भज' इति निषिद्धा अपि अनुगमे सिद्धा अभवत्।१८। दानानि दत्वा, अर्कं नत्वा, ईशं ध्यात्वा (सा) वह्निं आविशत्। तदा त्रि+अक्षः पञ्च+आस्यः पङ्क्ति+दोः प्रादुर्भूतः प्राह।१९। मया ईशेन मायां उद्भाव्य ते सर्वं परीक्षितम्। वारमुख्या अपि त्वं साध्वी। प्रीतः अस्मि। ईप्सितं वरय।२०।

असे बोलून त्याने तिच्या हातांत कङ्कण बांधून ते लिंग तिला दिले. तिनेसुद्धा ते लिंग मंडपांत ठेवले आणि त्याच्या बरोबर पत्नीधर्माने अंतर्गृहात गेली.१६. संभोगाच्या वेळी अचानक त्या मंडपाला आग लागली आणि तिथे ठेवलेले ते लिंग आणि ते माकड आणि कोंबडाही जळून भस्म झाले. ते पाहून त्या वैश्यानेही त्या अग्नीत आपले शरीर अर्पण केले.१७. पतीच्या मृत्यूने तळमळणारी ती वेश्याही पतीबरोबर सहगमन करण्यास निघाली. तिच्या स्वकीयांनी तिला खूप समजावले की 'आपल्या कुलधर्माच्या विरुद्ध असलेले कर्म तू करू नकोस.' पण तिने कुणाचेही ऐकले नाही.१८. यथाविधी दाने आणि वाणे देऊन, सूर्यनारायणाला नमस्कार करून भगवान शंकरांचे ध्यान करीत तिने अग्नीत प्रवेश केला. त्या वेळी तीन नेत्र, पाच मुखे आणि दहा भुजा असलेले भगवान शिव तेथे प्रकटले आणि म्हणाले.१९. 'मीच मायेने हे सर्व दाखवून तुझे धर्म, धैर्य आदींची परीक्षा पाहिली. तू वेश्या असलीस तरी खरोखर साध्वीच आहेस. मी प्रसन्न झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे.'२०.

**जैह्व्यौपस्थ्यं सुखं क्वापि न काङ्क्षे मे स्वकैः समम् । सायुज्यं तेऽर्पयेत्यूचे सा शिवोऽपि तथाऽकरोत ।।२१।।**
**तौ कीशकुक्कुटावेतौ पूर्वसंस्कारकारणात् । एतौ स्तोऽक्षप्रियौ शैवौ मताश्मसमभूषणौ ।।२२।।**
**तच्छ्रुत्वा भावि मे सूनोर्मुने शंसेति पृच्छते । राज्ञे तस्य मृतिर्नूनं सप्ताहादिति सोऽब्रवीत् ।।२३।।**
**मुहू राज्ञातिखिन्नेन प्रणतेनार्थितोऽब्रवीत् । पराशरऋषिर्मा भी राजन् रुद्रोऽस्ति तारकः ।।२४।।**
**स्रष्ट्रा सृष्टौ जगद्वृद्ध्यै धर्माधर्मौ तयोः पती । इन्द्रान्तकौ तौ स्वरधो-नेतारौ धन्यपापिनाम् ।।२५।।**

'जैह्व्य+औपस्थ्यं सुखं क्व अपि न कांक्षे। मे स्वकैः समं ते सायुज्यं अर्पय,' इति सा ऊचे। शिवः अपि तथा अकरोत्।२१। एतौ तौ कीश+कुक्कुटौ पूर्व+संस्कार+कारणात् अक्षप्रियौ मत+अश्म+सम+भूषणौ शैवौ स्तः।२२। तत् श्रुत्वा, (हे) मुने, मे सूनोः भावि शंस इति पृच्छते राज्ञे, तस्य नूनं सप्ताहात् मृतिः इति सः अब्रवीत्।२३। मुहु अति+खिन्नेन प्रणतेन राज्ञा अर्थितः पराशरऋषिः अब्रवीत्। '(हे) राजन्, मा भीः। रुद्रः तारकः अस्ति।२४। स्रष्ट्रा जगद्+वृद्ध्यै धर्म+अधर्मौ सृष्टौ। तयोः पती इन्द्र+अन्तकौ। तौ धन्य+पापिनां स्वः+अधो+नेतारौ।२५।

'जीभ आणि लिंग इत्यादींपासून होणाऱ्या ऐंद्रिय सुखाची, मग ते ऐहिक असो की पारलौकिक, मला मुळीच इच्छा नाही. मला माझ्या स्वकीयांसह आपले सायुज्य द्या,' असे ती वेश्या म्हणाली. भगवान शंकरांनी त्याचप्रमाणे तिला सपरिवार सायुज्य मुक्ती दिली.२१. हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा दोघे, तेच मंडपांत जळून गेलेले मर्कट आणि कुक्कुट आहेत. पूर्वजन्मीच्या संस्कारामुळे हे रुद्राक्षांची आवड असलेले आणि रत्नालंकारांना पाषाणासारखे तुच्छ मानणारे शिवभक्त झाले आहेत.'२२. ते आपल्या मुलाचे पूर्ववृत्त ऐकून राजाने विचारले की, 'ऋषिमहाराज, माझ्या मुलाचे भविष्य सांगा.' तेव्हां पराशर मुनींनी उत्तर दिले की, 'तुझ्या मुलाचा अवघ्या सात दिवसांनी मृत्यू होईल.'२३. ते ऐकून अत्यंत दुःखी झालेल्या राजाने वारंवार नमस्कार करून ह्या आपल्या मुलाच्या प्राणांसाठी प्रार्थना केली. त्यावर पराशर ऋषींनी त्याला धीर देत सांगितले, 'राजा! भिऊ नकोस. रुद्राध्याय तारक आहे.'२४. ब्रह्मदेवाने जगताच्या विस्तारासाठी धर्म आणि अधर्म निर्माण केले. धर्माचा पती इंद्र आणि अधर्माचा पती यम, हे दोघे अनुक्रमे पुण्यवान् आणि पापी लोकांना स्वर्गाला आणि नरकाला घेऊन जातात.२५.

**यमसारथयः काम-मुखा नानाघहेतवः । तत्सारथ्याद्यमो लोकान् पापान्क्षिपति दुर्गतौ ।।२६।।**
**बुद्धीन्द्रियमनःसंस्था अमी कामादयोऽबलाः । भीरून्निघ्नन्ति यमित-गोहृद्धीनामगोचराः ।।२७।।**
**वेदान्स्रष्टाऽसृजत्तत्र दक्षास्योत्थयजुःश्रुतेः । महारुद्रोऽघहृल्लब्धो मुनिभिः प्रसृतस्ततः ।।२८।।**

काममुखा यमसारथयः नाना+अघ+हेतवः। तत्+सारथ्यात् यमः पापान् लोकान् दुर्गतौ क्षिपति।२६। बुद्धि+इंद्रिय+मनः+संस्था अमी कामादयः अबलाः भीरून् निघ्नन्ति। यमित+गो+हृत्+धीनां अगोचराः।२७। स्रष्टा वेदान् असृजत्। तत्र दक्ष+आस्य+उत्थ+यजुः+ श्रुतेः मुनिभिः अघहृत् महारुद्रः लब्धः। ततः प्रसृतः।२८।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ हे यमाचे सहायक आहेत. हेच नानाविध पापांचे मूळ आहेत. त्यांच्या साह्याने यम पापी लोकांना नरकात टाकतो. 'माणसाला पापाला प्रवृत्त करणारे कोण आहेत?' या अर्जुनाच्या प्रश्नाला 'रजोगुणापासून उद्भवणारे हे महापापी आणि खादाड काम आणि क्रोधच वैरी आहेत.' असे भगवंतांनी उत्तर दिले आहे (*काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।* भ.गीता ३:३७).२६. हे कामादि यमाचे सेवक बुद्धी, इंद्रिये आणि मन यांच्या आश्रयाने राहतात (*इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।* भ.गीता ३:४०). तसे ते निर्बळच आहेत; पण भित्र्या लोकांचा घात करतात. मात्र इंद्रिये, मन आणि बुद्धी यांच्यावर नियंत्रण ठेवणाऱ्यांच्या ते वाऱ्यालाही उभे राहत नाहीत. कठोपनिषदांत (१:३:१०-११) सांगितल्याप्रमाणे इंद्रियांपेक्षा विषय श्रेष्ठ आहेत. विषयांहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहेत. आत्मा सर्वांहून वर असल्याने इंद्रियादींचे नियमन करणाऱ्या आत्मसाधकांना कामादींचे दर्शनही होत नाही हे उघडच आहे.२७. श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितल्याप्रमाणे (६:१८) ईश्वराने वेद निर्माण केले. ब्रह्मदेवाच्या उजव्या मुखापासून यजुर्वेदाची उत्पत्ती झाली. त्याच्यातून ऋषीमुनींना पापनाशक अशा महान् रुद्राध्यायाची प्राप्ती झाली. ती त्यांनी शिष्य-प्रशिष्यपरंपरेने प्रसृत केली.२८.

**विप्रा यत्र पठन्त्येतं कामाद्याः सकला न तम् । देशं शेकुरपि द्रष्टुं याम्यं शून्यमभूत्पुरम् ।।२९।।**
**यमः शशंस तद्धात्रे स्वपन्तिष्ठन्व्रजन्कुधीः । मत्तोऽभक्तिर्जपति चेत्स पापी शाधि तं भृशम् ।।३०।।**
**तद्भिन्नान्जापकान् रुग्णान्मा प्रेक्ष मृतिगानपि । श्रीविदारोग्यादिभाजस्त इत्याह यमं विधिः ।।३१।।**
**तस्मान्मृत्युञ्जयस्त्राता मा भीः सद्ब्रह्मतः शिवे । अतिरुद्राभिषेकात्स भवेद्भूपायुतायुरित् ।।३२।।**

यत्र विप्रा एतं पठन्ति तं देशं कामाद्याः सकलाः द्रष्टुं अपि न शेकुः। याम्यं पुरं शून्यं अभूत्।२९। यमः तत् धात्रे शशंस। (स आह) 'स्वपन् तिष्ठन्, व्रजन्, कुधीः मत्तः अभक्तिः जपति चेत् सः पापी। तं भृशं शाधि।'३०। तद्+भिन्नान् जापकान् रुग्णान्, मृतिगान् अपि मा प्रेक्ष। ते श्री+वित्+आरोग्य+आदि+भाजः, इति विधिः यमं आह।३१। तस्मात् मृत्युञ्जयः त्राता, मा भीः। (हे)भूप, सद्+ब्रह्मतः शिवे अतिरुद्राभिषेकात् सः अयुत+आयुः भवेत्।३२।

जिथे ब्राह्मण या रुद्राध्यायाचे पठण करीत त्या देशाकडे कामादि सर्व पाहूही शकले नाहीत. अर्थात् यमपुरीतील सर्व नरक ओस पडले.२९. यमाने ही गोष्ट ब्रह्मदेवांना सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'जे कुणी ह्या रुद्राध्यायचा पाठ झोपून, उभ्याने, चालत, लोभाविष्ट बुद्धीने किंवा माझ्या भक्तीविना करतील ते पापी आहेत. त्यांना तू कठोर शासन कर.'३०.

'वर सांगितलेले सोडून इतर जे जापक असतील, ते जरी आजारी, अगदी मरायला टेकलेले असले तरी त्यांच्याकडे पाहूसुद्धा नकोस. त्यांना संपत्ती, विद्या, आरोग्य इत्यादींची प्राप्ती होईल.' याप्रमाणे ब्रह्मदेवांनी यमाला आज्ञा केली.३१. पराशर ऋषी सांगत आहेत, अशा रीतीने मृत्यूला जिंकणारा रुद्र तारणारा आहे, भिऊ नकोस. राजा, चांगल्या ब्राह्मणांकडून शंकराला अतिरुद्राभिषेक केल्यावर हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा ह्या दोघांचेही आयुष्य दहा हजार वर्षे होईल.३२.

**तच्छ्रुत्वा द्राक्समाहूय सद्विप्रानृष्यनुज्ञया । राजानुष्ठानमारेभे श्रद्धाभक्त्या यथाविधि ।।३३।।**
**पाशदण्डधराः प्राप्ता सप्तमेऽह्नि यमानुगाः । गूढाङ्गा मूर्छितः पुत्रस्तदा तदुपरि द्विजैः ।।३४।।**
**प्रक्षिप्तरौद्राम्बुतीर्थ-मन्त्रिताक्षतसम्भवैः । रौद्रैर्दूताः पराभूता जग्मुस्तेऽथोत्थितः सुतः ।।३५।।**
**प्रीतो राजा तदा विप्रान् भोजयित्वाभ्यतोषयत । सभां विरच्योपवेश्य स्वासने शाक्त्यमाभजत् ।।३६।।**
**रणद्वीणो हरिं गायन्तत्राप्तो नारदो नृपः । तं प्रत्युद्गम्य सम्पूज्य लोकोदन्तमपृच्छत ।।३७।।**

तत् श्रुत्वा राजा द्राक् ऋषि+अनुज्ञया विप्रान् समाहूय श्रद्धा+भक्त्या यथाविधि अनुष्ठानं आरेभे।३३। सप्तमे अह्नि पाश+दण्ड+धराः गूढ+अङ्गाः यम+अनुगाः प्राप्ता। तदा पुत्रः मूर्छितः। तत् उपरि द्विजैः।३४। प्रक्षिप्त+रौद्र+अम्बु+तीर्थ+मंत्रित+अक्षत+सम्भवैः रौद्रैः दूताः पराभूताः। ते जग्मुः। अथ सुतः उत्थितः।३५। प्रीतः राजा तदा विप्रान् भोजयित्वा अभि+अतोषयत्। सभां विरच्य शाक्त्यं स्वासने उपवेश्य आभजत्।३६। तत्र रणत्+वीणः नारदः हरिं गायन् आप्तः। नृपः तं प्रति उद्गम्य सम्पूज्य लोक+उदन्तं अपृच्छत।३७।

मुनिवरांचे बोलणे ऐकून राजाने त्यांच्याच अनुज्ञेने लगेच ब्राह्मणांना पाचारण केले. आणि श्रद्धेने व भक्तीपूर्वक यथाशास्त्र अतिरुद्राच्या अनुष्ठानाला प्रारंभ केला.३३. सातव्या दिवशी पाश आणि दंड धारण केलेले यमदूत अदृश्यतया आले. तेव्हां राजपुत्र मूर्छित झाला. त्याच्यावर ब्राह्मणांनी रुद्राभिषेकाच्या पाण्याचे तीर्थ आणि अक्षता टाकल्या. त्यांपासून उद्भवलेल्या रुद्रदूतांनी यमदूतांचा पराभव केला आणि ते यमदूत निघून गेले. मग तो राजपुत्र उठून बसला.३४-३५.

प्रमुदित राजाने विप्रांना भोजनादि देऊन दक्षिणादींनी त्यांचा सत्कार केला. मग त्याने राज्यसभा भरवून आपल्या उच्च आसनावर पराशर ऋषींना बसवून त्यांची पूजा केली.३६. इतक्यांत आपल्या वीणेचा झंकार करीत आणि हरिनामाचा गजर करीत नारद तिथे आले. राजाने सामोरे जाऊन त्यांचा सत्कार केला आणि त्यांना राजाने स्वर्गलोकाची वार्ता विचारली.३७.

**स प्राहात्र महामृत्युस् त्वत्पुत्रं हर्तुमागतः । शिवदूतैः सदूतः स पराभूतो यमं ययौ ।।३८।।**
**यमोऽपि तैः सहैत्यैशान् दूतान्प्राहेश्वराज्ञया । नियतं कर्तुमुद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः ।।३९।।**
**ऊचुस्तेऽदश्चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थो भवान्तक । स पट्टे द्वादशाब्देऽल्पं मृत्युं तीर्त्वायुतायुरित् ।।४०।।**
**भविष्यतीति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान्क्षमापयत् । दृष्टं मयेदं ते पुत्रस्त्रातः शाक्त्येन भूपते ।।४१।।**
**इत्युक्त्वा नारदोऽगात्स्वराशीर्भिरभिनन्द्य तौ । शाक्त्योऽप्यगात्स्वधामेयान्तीर्थाक्षमहिमा सति ।।४२।।**

स प्राह। 'अत्र महामृत्युः त्वत्+पुत्रं हर्तुं आगतः। शिव+दूतैः सदूतः पराभूतः सः यमं ययौ।३८। यमः अपि तैः सह एत्य ऐशान् दूतान् प्राह। 'ईश्वर+आज्ञया नियतं कर्तुं उद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः?'३९। ते ऊचुः। '(हे) अन्तक, अदः चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थः भव।' स पट्टे द्वादश+अब्दे अल्पं मृत्युं तीर्त्वा इत् अयुत+आयुः।४०। भविष्यति इति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान् क्षमापयत्। '(हे) भूपते इदं मया दृष्टम्। ते पुत्रः शाक्त्येन त्रातः।'४१। इति उक्त्वा नारदः तौ आशीभिः अभिनन्द्य स्वः अगात्। शाक्त्यः अपि स्वधाम अगात्। (हे) सति, इयान् तीर्थ+अक्ष+महिमा।४२।

नारदमुनी म्हणाले, 'अरे राजा, आत्ता इथे महामृत्यू तुझ्या मुलाला घेऊन जायला आला होता. शिवदूतांनी त्याचा आणि त्याच्या दूतांचा पराभव केल्यावर तो यमराजाकडे गेला.३८. यमाने आपल्या दूतांचे म्हणणे ऐकले आणि तो शिवदूतांना येऊन म्हणाला, 'ईश्वराच्या आज्ञेने नेमून दिलेले कार्य मी करीत असता तुम्ही विघ्न करता हे योग्य नाही!'३९. ते शिवदूत त्याला म्हणाले, 'यमराज, ह्याची तुम्ही चित्रगुप्ताकडून खातरजमा करा ना!' तेव्हां यमधर्माने तुझ्या पुत्राचे खाते पाहिले. त्यांत असे लिहिले होते की, 'बाराव्या वर्षी अल्पमृत्यूपासून तरून तिथून पुढे तो दहा हजार वर्षे जगेल.' ते पाहून गोंधळात पडलेल्या यमाने शैवदूतांची क्षमा मागीतली. नारदमुनी पुढे म्हणाले, 'हे राजा, मी हे स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. तुझ्या मुलाला पराशरमुनींनीच जीवदान दिले आहे!'४०-४१. याप्रमाणे बोलून आणि त्या कुमारांचे आशीर्वादपूर्व अभिनंदन करून नारदमुनी स्वर्गाला गेले. पराशरही आपल्या घरी गेले. श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, हे सती, असा आहे रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा!४२.

॥ सावित्र्युवाच ॥

**यत्त्वद्दृग्गोचरा साक्षाज्जाता धन्यतमा गुरो । उपादिश मनुं मे ते पादाब्जस्मृतिहेतवे ॥४३॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**नोपदेश्यो मनुः स्त्रीणां पतिभक्तिस्तु तारका । दत्तोऽप्यनुपयुक्तः स्याद्दातुर्हानिश्च शुक्रवत् ॥४४॥**
**शृणु साध्वि पुरा देव-दैत्ययुद्धमभून्महत् । काव्यो मन्त्रजपाद्वज्रि-हतान्दैत्यानजीवयत् ॥४५॥**
**गत्वेन्द्रः शरणं शम्भुं तच्छशंस शिवेन तु । आनयित्वा कविर्लीढः सोऽपि मूत्राद्बहिर्गतः ॥४६॥**

सावित्री उवाच। '(हे) गुरो, यत् त्वत्+दृक्+गोचरा जाता धन्यतमा (अस्मि)। ते पाद+अब्ज+स्मृति+हेतवे मे मनुं उपादिश।'४३। श्रीगुरुः उवाच। 'स्त्रीणां पतिभक्तिः तु तारका, मनुः न उपदेश्यः, दत्तः अपि अनुपयुक्तः स्यात्। शुक्रवत् दातुः हानिः।'४४। '(हे) साध्वि, शृणु। पुरा महत् देव+दैत्य+युद्धं अभूत्। काव्यः मन्त्रजपात् वज्रि+हतान् दैत्यान् अजीवयत्।४५। इन्द्रः शंभुं शरणं गत्वा तत् शशंस। शिवेन तु कविः आनयित्वा लीढः। सः अपि मूत्रात् बहिः गतः।'४६।

सावित्री म्हणाली, 'गुरुमहाराज, आपल्या कृपाकटाक्षाने मी खरोखर धन्यातिधन्य झाले आहे! आपल्या पदकमलांचे स्मरण मला राहावे यासाठी आपण मला मंत्राचा उपदेश करावा.'४३. श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतिभक्ती हाच तरणोपाय आहे. स्त्रियांना मंत्र देऊ नये. दिला तरी व्यर्थच होतो. शिवाय शुक्रासारखी मंत्र देणाऱ्याचीही हानी होते.'४४. हे सती ऐक. पूर्वी देव आणि दैत्य यांचे मोठे युद्ध झाले. इंद्राच्या वज्राने दैत्यांचा संहार होत असे. पण दैत्यांचे गुरू शुक्राचार्य संजीवनी मंत्राचा जप करून त्या दैत्यांना पुनः जिवंत करीत.४५. इन्द्राने भगवान् शंकरांना शरण जाऊन हे त्यांच्या कानांवर घातले. शंकरांनी शुक्राचार्यांना आणून गिळून टाकले. पण तो कांही काळ शंकरांच्या पोटात राहून नंतर मूत्रद्वारे बाहेर पडला. पूर्वी दैत्यगुरूंचे नांव भार्गव असे होते; पण शिवाच्या शुक्राशी (वीर्याशी) संबंध आल्याने त्याचे नाव शुक्र असे पडले. स्कंद पुराणाच्या प्रभास खंडांत ही कथा आहे.४६.

**दैत्यानेत्य पुनः शुक्रस्तान्मृतानप्यजीवयत् । त्रस्तस्तदेन्द्रो धीमन्नः पाहीति प्रार्थयद्गुरुम् ।।४७।।**
**स प्राह तन्मनौ व्याजाद्भ्रंशिते वो जयो ध्रुवः । त्रिलोककण्टकोत्कर्षान् मन्त्रसारहृतिर्वरम् ।।४८।।**
**इत्युक्त्वा स कचं प्राह स्वसुतं गच्छ रे कविम् । विद्यार्थित्वेन तं तुष्ट्वा मन्त्रसारं तिरस्कुरु ।।४९।।**
**तं नत्वापि कचो गत्वा शुक्रं प्राहास्मि ते गुरो । शिष्यो मां प्रणतं शाधि पक्षित्वं मा निधा मयि ।।५०।।**
**एवमुक्तवतस्तस्य रूपसौन्दर्यमोहिता । शुक्रं प्रियात्मजोचेऽमुं शिष्यत्वेनोररीकुरु ।।५१।।**

शुक्रः पुनः दैत्यान् एत्य तान् मृतान् अपि अजीवयत्। तदा इन्द्रः त्रस्तः गुरुं धीमन् नः पाहि इति प्रार्थयत्।४७। स प्राह। 'तत्+मनौ व्याजात् भ्रंशिते (सति) वः जयः ध्रुवः। त्रिलोक+कंटक+उत्कर्षात् मंत्र+सार+हृतिः वरम्।'४८। इति उक्त्वा सः कचं प्राह। 'रे, कविं गच्छ। तं विद्यार्थित्वेन तुष्ट्वा मंत्रसारं तिरस्कुरु।'४९। तं नत्वा अपि कचः शुक्रं गत्वा प्राह। '(हे) गुरो, ते शिष्यः अस्मि। मां प्रणतं शाधि। मयि पक्षित्वं मा निधा।'५०। एवं उक्तवतः तस्य रूप+सौंदर्य+मोहिता प्रिया आत्मजा शुक्रं ऊचे। 'अमुं शिष्यत्वेन उरीकुरु।'५१।

शुक्राचार्य दैत्यांकडे परत आले आणि पुनः मृत दैत्यांना सजीव करू लागले. ह्यामुळे त्रासलेला इंद्र देवगुरू बृहस्पतींकडे गेला. आपण बुद्धिवंत आहांत, 'आमचे रक्षण करा' अशी त्याने प्रार्थना केली.४६. बृहस्पती म्हणाले, 'कांही तरी कपटाने त्या शुक्राचार्यांचा मंत्र भ्रष्ट करायला हवा. त्रैलोक्याला त्रासणाऱ्या या दैत्यांचा उत्कर्ष होण्यापेक्षा त्या मंत्राचे सारच घालवून टाकावे हे बरे!' दुर्जन वरचढ होऊ लागले तर त्यांच्या प्रतिकारासाठी कपटाचा आश्रय घेण्यांत दोष नाही, असा त्यांचा अभिप्राय.४८. असे इंद्राशी बोलून देवगुरू आपल्या पुत्राला - कचाला, म्हणाले, 'बाळा, तू शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांचे शिष्यत्व पत्कर. हर प्रकारे त्यांचे मन संतुष्टवून संधी साधून त्यांच्या मंत्राचा प्रभाव नष्ट कर.'४९. आपल्या पित्याला वंदन करून कच लगेच निघाला. शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांना नमस्कार करून म्हणाला, 'गुरुमहाराज, मी आपला शिष्य होऊं इच्छितो. नम्रपणे आपल्याला शरण आलों आहे. तरी आपण माझा अंगीकार करा. मी देवगुरूंचा पुत्र असलो तरी आपण दुजाभाव मनांत न ठेवतां माझे गुरु व्हा.'५०. कच शुक्राचार्यांशी असे बोलत असतांना, दैत्यगुरूंची एकुलती एक लाडकी कन्या देवयानी जवळच उभी होती. ती कचाच्या सुंदर रूपाने मोहित झाली आणि आपल्या पित्याला म्हणाली, 'बाबा, ह्याला शिष्य करून घ्या ना!'५१.

**तच्छ्रुत्वोशनसा सोऽपि तद्वात्सल्यादुरीकृतः । कचोऽपि सर्वभावेन शुक्रं गुरुमतोषयत् ।।५२।।**
**ज्ञात्वा तच्छाठ्यमसुराः समिदर्थं गतं वनम् । तं जघ्नुर्देवयान्याह शुक्रं नाप्तः कुतः प्रियः ।।५३।।**
**शुक्रोऽपि तं हतं ज्ञात्वा ध्यानान्मन्त्रप्रभावतः । जीवयित्वाऽऽनयद्गेहं कचं हृष्टाभवत्सुता ।।५४।।**
**मुहुर्दैत्या वने हत्वा हिंस्रेभ्यस्तत्पलं ददुः । तमदृष्ट्वैव शोचन्तीं कन्यामाश्वास्य भार्गवः ।।५५।।**
**ज्ञात्वा तं भक्षितं हिंस्रैस् तत्कुक्षेर्मन्त्रशक्तितः । कात्स्न्यान्निष्काश्य कृत्वैक्यं सजीवं पूर्ववद्व्यधात् ।।५६।।**

तत् श्रुत्वा उशनसा तत्+वात्सल्यात् सः अपि उरीकृतः। कचः अपि गुरुं शुक्रं सर्वभावेन अतोषयत्।५२। असुराः तत्+शाठ्यं ज्ञात्वा समिदर्थं वनं गतं तं जघ्नुः। देवयानी शुक्रं आह। 'प्रियः कुतः न आप्तः?'५३। शुक्रः अपि ध्यानात् तं हतं ज्ञात्वा, मंत्र+प्रभावातः जीवयित्वा कचं गेहं आनयत्। सुता हृष्टा अभवत्।५४। मुहुः दैत्याः (कचं) वने हत्वा तत्+पलं हिंस्रेभ्यः ददुः। तं अदृष्ट्वा शोचन्तीं कन्यां आश्वास्य भार्गवः।५५। तं हिंस्रैः भक्षितं ज्ञात्वा, मंत्र+शक्तितः तत्+कुक्षेः निष्काश्य ऐक्यं कृत्वा पूर्ववत् व्यधात्।५६।

तिचा आग्रह पाहून तिच्यावरील वात्सल्याने शुक्राचार्यांनी कचाला, तो देवगुरूंचा पुत्र असूनही शिष्य करून घेतले. कचानेही आपले गुरू शुक्राचार्यांची सर्व प्रकारे सेवा करून त्यांना प्रसन्न केले.५२. मात्र असुरांना हे कचाचे कपट लक्षात आले. त्यांनी एकदा संधी साधून कच समिधा आणायला वनात गेलेला असताना त्याला गाठून ठार केले. बराच उशीर होऊनही कच घरी न परतल्याने देवयानी अस्वस्थ झाली आणि आपल्या वडिलांना म्हणाली, 'कच अजून कसा आला नाही?' ५३. शुक्राचार्यांनी ध्यानाने कचाची हत्या झाल्याचे जाणले आणि संजीवनी मंत्राच्या प्रभावाने त्याला जिवंत करून घरी परत आणले. देवयानीला त्यामुळे आनंद वाटला.५४. दैत्यांनी पुन्हा कचाला ठार करून त्याचे मांस हिंस्र पशूंना खाऊ घातले. कच न दिसल्यामुळे शोक करणाऱ्या आपल्या मुलीला आश्वासित करून(५५) शुक्राचार्यांनी त्याला श्वापदांनी खाल्ल्याचे जाणले. मग त्याला त्या श्वापदांच्या पोटांतून पूर्णपणे काढले आणि एकत्र जोडून पुन्हा पहिल्याप्रमाणे जिवंत केले.५६.

**पुनर्दैत्याः कचं हुत्वा तद्भस्म मधुयोजितम् । ददुः शुक्राय प्रमादात् स पपौ दैत्यवत्सलः ।।५७।।**
**पुनः कन्यातिखिन्नाऽभूच्छुक्रो ज्ञात्वोदरस्थितम् । दैत्यान्छशाप ब्रह्मघ्नान् कन्यामाह स नाप्यते ।।५८।।**
**दैत्यैः क्षिप्तः स मत्कुक्षौ तदानयनतो हि मे । मृत्युर्भवेन्न को वेद दिव्यं मन्त्रं हि मां विना ।।५९।।**
**कन्योचे तात मे मन्त्रमुपादिश च जीवय । तं त्वां यदेष्यति मृतिर्जीवयामि सुमन्त्रतः ।।६०।।**
**नोचेत्प्राणांस्त्यजामीति निर्विण्णास्यै स मोहतः । दत्वा मन्त्रं जपित्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ ।।६१।।**

पुनः दैत्याः कचं हुत्वा तत्+भस्म मधु+योजितं शुक्राय ददुः। दैत्यवत्सलः सः प्रमादात् पपौ।५७। पुनः कन्या अति+खिन्ना अभूत्। शुक्रः (तं) उदर+स्थितं ज्ञात्वा ब्रह्मघ्नान् दैत्यान् शशाप। कन्यां आह, 'सः न आप्यते।५८। दैत्यैः सः मत्+कुक्षौ क्षिप्तः। तत्+आनयतः हि मे मृत्युः भवेत्। दिव्यं मंत्रं हि मां विना कः न वेद।'५८-५९। कन्या ऊचे। '(हे) तात, मे मंत्रं उपादिश च तं जीवय। यत् त्वां मृतिः एष्यति (अहं) सुमंत्रतः जीवयामि।६०। नो चेत् प्राणान् त्यजामि।' इति निर्विण्णा। सः अस्यै मोहतः मन्त्रं दत्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ।६१।

मग दैत्यांनी कचाला जाळून त्याचे भस्म केले आणि ते मधांत कालवून शुक्राला दिले. दैत्यांच्या वात्सल्याने शुक्राने फारशी चौकशी न करता ते पिऊनही टाकले.५७. त्या दिवशीसुद्धा कच आला नाही असे पाहून कन्या फारच खिन्न झाली. शुक्राचार्यांनी ध्यानाने पाहता तो आपल्याच पोटात असल्याचे त्यांना दिसून आले. तेव्हा दैत्यांनी केलेल्या ब्रह्महत्येने संतापून त्यांनी त्यांना शाप दिला आणि देवयानीला म्हणाले, 'तो आता कांही परत येणार नाही.५८. दैत्यांनी त्याला माझ्याच पोटात घातले आहे. त्याला आणले तर नक्कीच माझा मृत्यू होईल. आणि दिव्य संजीवनी मंत्र माझ्यावांचून कुणालाच येत नाही.'५९. देवयानी म्हणाली, 'बाबा! तो मंत्र मला शिकवा आणि कचाला जिवंत करा. तुम्हांला मृत्यू आल्यावर त्या संजीवनी मंत्राने मी तुम्हांला जिवंत करीन. अन्यथा मीच प्राणत्याग करीन!' असे कन्येचे निर्वाणीचे बोलणे ऐकून तिच्या ममतेने मोहित अशा शुक्राचार्यांनी मंत्राचा जप करून कचाला जिवंत केले आणि स्वतः मरण पावले.६०-६१.

**विदार्य जठरं प्राप्तं कचं दृष्ट्वा मृतं कविम् । मन्त्रेण जीवयामास तदाऽतेजाऽभवन्मनुः ।।६२।।**
**कृतकृत्यः कचो नत्वा गुरुं प्राह तदासुराः । घ्नन्ति मां तद्गृहं यास्ये मदर्थे भवतोऽप्यकम् ।।६३।।**
**सोऽपि गच्छेत्यादिदेश कन्योचे मत्पतिर्भव । मयैतदर्थमेव त्रिर्-जीवितोसि मृतोऽप्यहो ।।६४।।**
**कच ऊचे गुरोः कन्या स्वसाम्बास्वर्पणाच्च तत् । नोद्वाह्यातस्त्यजास्वर्ग्यं विरुद्धाग्रहमम्ब भोः ।।६५।।**
**सा विद्यां विस्मरेत्येनं शशापापि स तां नृपः । त्वां वरिष्यति मौर्ख्यात्ते नश्येन्मन्त्रो गुरोरिति ।।६६।।**

जठरं विदार्य प्राप्तं कचं दृष्ट्वा (देवयानि) मृतं कविं मन्त्रेण जीवयामास। तदा मनुः अतेजा अभवन्।६२। तदा कृतकृत्यः कचः गुरुं नत्वा प्राह। 'असुराः मां घ्नन्ति। तत् गृहं यास्ये। मत् अर्थे भवतः अपि अकम्।'६३। सः अपि 'गच्छ' इति आदिदेश। कन्या ऊचे, 'मत् पतिः भव। मया एतत् अर्थं एव त्रिः मृतः अपि जीवितः असि।'६४। कच ऊचे। 'गुरु+कन्या स्वसा। असु+अर्पणात् च अम्बा। तत् न उद्वाह्या। अतः भो अम्ब, अस्वर्ग्यं विरुद्ध+आग्रहं त्यज।'६५। सा एनं 'विद्या विस्मर' इति शशाप। सः तां, 'ते मौर्ख्यात् त्वां नृपः वरिष्यति। गुरोः मन्त्रः नश्येत्।' इति (शशाप)।६६।

आपल्या पित्याचे पोट फाडून कच बाहेर आलेला पाहताच देवयानीने मन्त्राने शुक्राचार्यांना जिवंत केले. मात्र त्यानंतर त्या मंत्राचे तेज लोप पावले.६२. तेव्हा आपला कार्यभाग साधलेला जाणून कचाने गुरू शुक्राचार्यांना वंदन केले आणि म्हणाला, 'हे दैत्य मला कांही जिवंत ठेवणार नाहीत. तेव्हा मी आपल्या घरी जातो. माझ्याकारणे आपल्यालाही खूप कष्ट झाले.'६३. शुक्राचार्यांनीही त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. तेव्हा देवयानी कचाला म्हणाली, 'तू माझा पती हो! याचसाठी तू मेलेला असताही तुला तीन वेळा मी जीवदान दिले.'६४. कच उत्तरला, 'तू गुरूंची कन्या असल्याने माझी बहीण लागतेस. मला जीवदान दिल्याने आता तू माझी माताच आहेस. तेव्हा आपला विवाह होऊ शकत नाही. तरी माते, हा अधःपातकारी शास्त्रविरुद्ध हट्ट तू सोड.'६५. तेव्हां तिने त्याला 'तू तुझी विद्या विसरशील!' असा शाप दिला. त्यानेही तिला उलट शाप दिला की, 'तुझ्या मूर्खपणाने तुझे लग्न राजाशी (क्षत्रियाशी) होईल आणि गुरुमहाराजांचा मंत्र नष्ट होईल.'६६.

**मन्त्रोऽतेजास्तदैवाभूच्छुक्रो दीनत्वमापतत् । स्त्रियै मन्त्रस्ततोऽदेयः कार्यं गुर्वाज्ञया व्रतम् ।।६७।।**

**।। सावित्र्युवाच ।।**

**भगवन्सद्गुरो मन्त्रो यर्ह्यग्राह्यो हि योषिताम् । तर्ह्येकं व्रतमाख्याहि तारकं ते स्मृतिप्रदम् ।।६८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सुलभं तारकं साध्वि सोमवारमहाव्रतम् । व्रतोत्तमं सुधामेष्ट-दं केऽप्यस्याधिकारिणः ।।६९।।**

'तदा एव मन्त्रः अतेजा अभूत्। शुक्रः दीनत्वं आपतत्। ततः स्त्रियै मन्त्रः अदेयः। गुरु+आज्ञया व्रतं कार्यम्।'६७। सावित्री उवाच। '(हे) सद्गुरु भगवन्, यर्हि योषितां मन्त्रः अग्राह्यः तर्हि एकं तारकं ते स्मृतिप्रदं व्रतं आख्याहि।'६८। श्रीगुरुः उवाच। '(हे) साध्वि, सोम+वार+महा+व्रतं व्रतोत्तमं सुलभं तारकं सुधाम+इष्टदम्। सर्वे अपि अस्य अधिकारिणः।६९।

**स्त्रियांना मंत्राचा अधिकार आहे का?** तत्काळ तो संजीवनी मंत्र निस्तेज झाला आणि शुक्राचार्यांना दीनत्व आले. एवढ्यासाठी स्त्रियांना मंत्र देऊ नये. पूर्वीच्या युगात गोधा, घोषा, विश्ववारा इत्यादि ब्रह्मज्ञानी स्त्रियांचा उल्लेख आहे. *घोषा गोधा विश्ववारा, अपालोपनिषन्निषत्। ब्रह्मजाया जहुर्नाम अगस्त्यस्य स्वसा दिती।।८४।। इन्द्राणी चेन्द्रमाता च सरमा रोमशोर्वशी। लोपामुद्रा च नद्यश्च यमो नारी च शाश्वती।।८५।। श्रीर्लक्ष्मी सर्पराज्ञा वाक्श्रद्धा मेधा च दक्षिणा। रात्रि सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरितः।।८६।।* (बृहत् देवता अ. २४) तथापि सांप्रत कलियुगात स्त्रियांना मंत्राचा अधिकार नाही हा विशेष आहे. यावर असा आक्षेप घेता येईल की, गीतेत (९:३२) स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हेसुद्धा परम गती पावतात असे म्हटले आहे. मंत्राचा जर त्यांना अधिकार नसेल तर त्यांना मोक्ष कसा मिळेल? याचे समाधान श्लोकाच्या अंतिम चरणांत दिले आहे. त्यांनी व्रत करावे; पण तेही गुरूंच्या आज्ञेने, आपल्या स्वतंत्र बुद्धीने नाही. वितानकर्मांत (वितान=अथर्ववेदाचे परिशिष्ट) मात्र स्त्रियांना मंत्रपाठाचा आणि श्रवणाचा अधिकार आहे.६७.

**सीमन्तिन्या यत्प्रभावान् नष्टोऽप्याप्तः पतिः शृणु । प्राक् चित्रवर्मार्यावर्ते राजा शूरो वशी कृती ।।७०।।**
**धीरूपशीललक्ष्माढ्यां पुत्रीं लेभेऽजसेवया । शान्त्याद्याढ्या सती भर्त्रायुताब्दं राज्यभोक्त्र्यसौ ।।७१।।**
**इत्यूचुर्गणकास्त्वेको बाल्ये वैधव्यमित्यपि । राजा हृष्टोऽपि खिन्नोऽभूद् ववृधे सा सितेन्दुवत् ।।७२।।**

यत् प्रभावात् सीमन्तिन्या नष्टः अपि पतिः आप्तः (तत्) शृणु। प्राक् आर्यावर्ते चित्रवर्मा वशी कृती राजा (अभूत्)।७०। (सः) अज+सेवया धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्यां पुत्रीं लेभे। गणकाः, असौ शान्ति+आदि+आढ्या सती भर्त्रा अयुत अब्दं राज्य+भोक्त्री इति ऊचुः। एको, 'बाल्ये वैधव्यं' इति अपि। राजा हृष्टः अपि खिन्नः अभूत्। सा सित+इन्दु+वत् ववृधे।७१-७२।

त्यावर सावित्रीने प्रार्थना केली, 'अहो सद्गुरू भगवान, जर स्त्रियांना मंत्र घेता नाही तर मग आपण मला एक असे तारक व्रत सांगा ज्यायोगे मला आपले स्मरण राहील.' वरील गीताश्लोकांत स्त्रियादिकांना मोक्षासाठी आपला व्यपाश्रय (आधार) आवश्यक असल्याचे प्रतिपादन आहे. म्हणून ही सती गुरुस्मरणाची याचना विशेषत्वाने करीत आहे.६८. श्रीगुरू म्हणाले, 'हे सती, सोमवार हे महाव्रत सर्व व्रतांत उत्तम व्रत आहे. ते सुलभ, तारक, प्रभावी आणि इष्टकामना पुरविणारे आहे. हे व्रत कुणालाही - धर्मबाह्य यवनादिकांना सोडून, सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्रिया इत्यादींना करता येते. उमा म्हणजे अध्यात्मविद्या किंवा पार्वतीमाता, तिच्यासह असलेला सोम म्हणजे भगवान शंकर. त्यांचा वार म्हणजे आनंदवर्धक दिवस तो सोमवार. हे नित्यही करता येते किंवा काम्यही आहे त्यामुळे त्याला महाव्रत म्हटले आहे.६९. ज्या व्रताच्या प्रभावाने सीमन्तिनीला आपला मरण पावलेला पतीसुद्धा परत मिळाला त्याची कथा ऐक. पूर्वी आर्यावर्तात चित्रवर्मा सामर्थ्यशाली आणि प्रतापी राजा होता.७०. त्या राजाला भगवान शंकरांच्या उपासनेच्या फलस्वरूप एक मुलगी झाली. ती बुद्धिमान, रूपवान्, शीलवान आणि उत्तम लक्षणांनी युक्त अशी होती. तिच्या जन्माच्या वेळेनुसार ज्योतिष्यांनी भाकित वर्तविले की, 'ही कन्या शांती, दया, क्षमा आदि गुणांनी युक्त अशी सती असून आपल्या पतीसह दहा हजार वर्षे राज्य करील.' राजाला आनंद वाटला; पण तेवढ्यात एक ज्योतिषी असेही म्हणाला की, 'ही बालपणीच विधवा होईल.' राजाच्या आनंदावर विरजण पडल्यासारखे झाले. पुढे ती कन्या शुक्लपक्षाच्या चंद्रासारखी वाढू लागली.७१-७२.

**सा द्वादशाब्दिका श्रुत्वा वैधव्यं भावि दुःखिता । नत्वैकदाप्तां मैत्रेयीं साऽवैधव्यं स्म याचते ।।७३।।**
**तां साब्रवीत्सोमवार-व्रतात् त्रातास्ति शंकरः । प्रतीन्दुवारं संसेव्यो गोहृत्कायैः सदाशिवः ।।७४।।**
**उपोष्य नक्तं भुक्त्वा वा भक्त्यास्मिन्न क्षणं स्वपेत् । नश्येत्प्राप्तापि भीस्त्यक्ते व्रते कुप्येत शंकरः ।।७५।।**

सा द्वादश+अब्दिका भावि वैधव्यं श्रुत्वा दुःखिता। सा एकदा आप्तां मैत्रेयीं नत्वा अवैधव्यं याचते स्म।७३। सा तां अब्रवीत्। 'सोमवार+व्रतात् शंकरः त्राता अस्ति। प्रति इन्दुवारं गो+हृत्+कायैः सदाशिवः (सदा शिवः) उपोष्य, नक्तं भुक्त्वा वा भक्त्या संसेव्यः। अस्मिन् न क्षणं (अपि) स्वपेत्। प्राप्ता अपि भी नश्येत्। व्रते त्यक्ते शंकरः कुप्येत।७४-७५।

ती बारा वर्षांची असताना आपण विधवा होणार असल्याचे भविष्य तिच्या कानांवर पडले. त्यामुळे ती दुःखित झाली. एकदा घरी आलेल्या मैत्रेयीला शरण जाऊन तिने अवैधव्याची याचना केली. **'आप्तां'** या शब्दाचा अर्थ आलेल्या असाही होतो किंवा हितोपदेश करणारी ब्रह्मज्ञानी साध्वी असाही होतो.७३. मैत्रेयीने तिला सांगितले, 'सोमवार व्रत करणाऱ्याचे भगवान शंकर रक्षण करतात. दर सोमवारी इंद्रिये, मन आणि देह यांनी (कायावाचामने) उपास करून किंवा रात्री उपास सोडून भक्तिभावाने सदाशिवाची सेवा करावी. त्या दिवशी क्षणभरही झोपू नये. किंवा स्वयंप्रकाश अपरोक्षरूप शिवाच्या चिंतनात किंचितसुद्धा प्रमाद करू नये. अगदी समोर आलेले संकटही नाश पावते. एकदा घेतलेले व्रत टाकले तर मात्र शंकरांचा कोप होतो'. व्रताचे सातत्य टिकावे म्हणून हे शासन सांगितले आहे.७४-७५.

**पापक्षयोऽस्याभिषेकात् साम्राज्यं पीठपूजनात् । गन्धादिदानात्सौभाग्यं सौगन्ध्यं धूपदानतः ।।७६।।**
**दीपात्कान्तिर्भोज्यदानाद्भुक्तिस्ताम्बूलतो रमा । नत्या पुमर्था ऐश्वर्यं जपाद्ब्राह्मणभोजनात् ।।७७।।**
**सर्वतृप्तिः कोशवृद्धिर्होमाल्लभ्याखिलं स्तवात् । तद्व्रतं कुर्विति प्रोक्त्वा सागात्कन्याऽकरोद्व्रतम् ।।७८।।**
**भूयाद्भाव्येषा देयेति मत्वा चन्द्राङ्गदाय राट् । तां वरायानुरूपाय नलगोत्रभुवे ददौ ।।७९।।**
**गजाश्वदासराष्ट्रादि दत्वापि स्वपुरे मुदा । पुत्राभावात्स तं राजा मेने संस्थाप्य पुत्रवत् ।।८०।।**

अस्य अभिषेकात् पापक्षयः, पीठपूजनात् साम्राज्यं, गन्धादिदानात् सौभाग्यं, धूपदानात् सौगन्ध्यम्।७६। दीपात् कान्तिः, भोज्यदानात् भुक्तिः, ताम्बूलतो रमा, जपात् ऐश्वर्यं, ब्राह्मणभोजनात् सर्वतृप्तिः, होमात् कोशवृद्धिः, स्तवात् अखिलं लभ्य। तत् व्रतं कुरु इति प्रोक्त्वा सा अगात्। कन्या व्रतं अकरोत्।७७-७८। राट् 'भावि भूयात्, एषा देया' इति मत्वा तां अनुरूपाय वराय नल+गोत्र+भुवे चन्द्राङ्गदाय ददौ।७९। गज+अश्व+दास+राष्ट्र+आदि दत्वा अपि राजा पुत्र+अभावात् तं मुदा स्वपुरे संस्थाप्य पुत्रवत् मेने।८०।

आता सोमवारी केलेल्या शिवाच्या पूजनाची फळे सांगतात. शंकराला अभिषेक केल्याने पापक्षय होतो; पीठपूजनाने साम्राज्यप्राप्ती; सुगंधी पदार्थ अर्पण केल्याने सौभाग्य; धूप दिल्याने देह सुगंधी होतो; दीप दाखविल्याने शरीर तेजस्वी होते; नैवेद्य समर्पण केल्याने सर्व भोग मिळतात; विडा दिल्याने लक्ष्मीचा लाभ होतो; जपाने ऐश्वर्य येते; शिवप्रीत्यर्थ ब्राह्मण जेवू घातले तर सर्वांची तृप्ती; आणि होम केल्याने सर्व कांही प्राप्त होते. 'तरी तू हे व्रत कर.' असे सांगून मैत्रेयी निघून गेली. सीमन्तिनीने तिच्या उपदेशानुसार सोमवार व्रत सुरू केले.७६-७८.

यथाकाल आपली कन्या उपवर झालेली पाहून, 'जे होणार ते चुकेना' अशा विचाराने राजाने तिचा विवाह तिला अनुरूप अशा नलराजाच्या गोत्रातील चंद्रांगद नावाच्या वराशी केला.७९. राजाने जावयाला हत्ती, घोडे, दास-दासी, राज्य इत्यादि आंदण तर दिलेच. पण राजाला पुत्र नसल्याने त्याने चंद्रांगदालाच आपला पुत्रच मानून आपल्याच नगरीत ठेवून घेतले.८०.

**कालिन्द्यामेकदा क्रीडन्मज्जति स्म स तच्चराः । पितरौ श्वशुरौ गत्वा तदूचुस्तत एत्य ते ।।८१।।**
**अन्वेष्यापि न तं प्रापुः शोकं चक्रुस्तदाखिलाः । कन्यानुगन्तुमुत्कापि शवाभावान्निवारिता ।।८२।।**
**तामाश्वास्यानयद्राष्ट्रं चित्रवर्मा नृपः सुता । शोकार्ताप्यकरोत्प्रेम्णा सोमवारव्रतं शुभम् ।।८३।।**
**पुत्रशोकाकुलं त्विन्द्र-सेनं सस्त्रीकमुत्तमम् । खिन्नं संस्थाप्य कारायां तद्राज्यं बुभुजेऽहितः ।।८४।।**
**तं नागिन्योऽम्बुमग्नं स्वं लोकं नीत्वामृतोपमम् । सर्पेशाय ददुः सर्पेट् सुधया तं व्यजीवयत् ।।८५।।**

एकदां कालिन्द्यां क्रीडन् सः मज्जति स्म। तत्+चराः पितरौ श्वशुरौ गत्वा तत् ऊचुः। ततः ते एत्य अन्वेष्य अपि तं न प्रापुः। तदा अखिलाः शोकं चक्रुः। कन्या अनुगन्तुं उत्का अपि शव+अभावात् निवारिता।८१-८२। चित्रवर्मा नृपः तां आश्वास्य राष्ट्रं आनयत्। सुता शोक+आर्ता अपि शुभं सोमवारव्रतं प्रेम्णा अकरोत्।८३। पुत्र+शोक+आकुलं खिन्नं इन्द्रसेनं तु अहितः सस्त्रीकं कारायां संस्थाप्य तत्+राज्यं बुभुजे।८४। अम्बु+मग्नं तं नागिन्यः स्वं अमृत+उपमं लोकं नीत्वा सर्पेशाय ददुः। सर्पेट् तं सुधया व्यजीवयत्।८५।

एकदा तो चंद्रांगद यमुना नदीत जलक्रीडा करीत असता बुडाला. त्याच्या सहचरांनी ते वृत्त त्याच्या मातापित्यांना आणि सासूसासऱ्यांना जाऊन सांगितले. सगळ्यांनी तिथे येऊन नदीत त्याला खूप शोधले. पण तो कांही सापडला नाही. सगळे शोक करू लागले. सीमन्तिनी सहगमन करण्यास उत्सुक होती. पण प्रेत जवळ नसल्याने तिला सगळ्यांनी परावृत्त केले.८१-८२. तिची समजून घालून चित्रवर्मा राजाने आपल्या घरी आणले. शोकग्रस्त असूनही सीमन्तिनीने मंगलदायक सोमवारव्रत प्रीतीपूर्वक चालूच ठेवले.८३. पुत्राच्या शोकाने व्याकुळ आणि खिन्न झालेल्या इन्द्रसेन राजाला त्याच्या शत्रूंनी पत्नीसह कारागृहात टाकले आणि त्याचे राज्य बळकावून घेतले.८४. इकडे पाण्यात बुडालेल्या चंद्रांगदाला नागस्त्रियांनी पाहिला. त्यांनी त्याला पाताळात नेले आणि आपला राजा वासुकी याच्या ताब्यात दिले. नागराजाने त्याला अमृत पाजून जिवंत केले.८५.

**अलौकिकं पुरं नागान्दृष्ट्वा स चकितोऽभवत् । वासुकिः प्राह तं कस्त्वं कस्य भक्तोऽसि मे वद ।।८६।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**सच्छ्लोकनलवंशोत्थ इन्द्रसेनसुतोऽस्म्यहम् । चन्द्राङ्गदाभिधो राजा जामाता चित्रवर्मणः ।।८७।।**

**कालिन्द्यां पतितस्त्वत्र केनानीतो न वेद्मि तत् । दैवाद्वो दर्शनं जातं सफलं जन्म कर्म मे ।।८८।।**

सः अलौकिकं पुरं, नागान् दृष्ट्वा चकितः अभवत्। वासुकिः तं प्राह। 'त्वं कः? कस्य भक्तः असि? मे वद।'८६। चन्द्रांगद उवाच। 'अहं सत्+श्लोक+नल+वंश+उत्थ इन्द्रसेन+सुतः चन्द्रांगद+अभिधः राजा चित्रवर्मणः जामाता अस्मि।८७। (अहं) कालिन्द्यां पतितः। अत्र तु केन आनीतः तत् न वेद्मि। दैवात् वः दर्शनं जातम्। मे जन्म कर्म सफलम्।'८८।

ते पाताललोकातील अलौकिक नगर आणि तिथले सर्व नाग पाहून तो चंद्रांगद विस्मित झाला. वासुकीने त्याला विचारले, 'तूं कोण आहेस? आणि कुणाचा भक्त आहेस? मला सांग.' इथे अशी एक शंका उपस्थित होऊ शकते की कर्मकांडात हे व्रत आणि उपासना यांचा समावेश असंगत आहे. पण देवताज्ञानपूर्वक कर्म हे श्रेष्ठ मानलेले आहे. व्रताच्या निमित्ताने देवताज्ञानासहित (विद्या) कर्माचे (अविद्या) अनुष्ठान (*विद्यांचाविद्यां च*) श्रुतीच्या प्रतिपादनाला धरून आहे (ईश उ. ९:१२).८६. चंद्रांगद म्हणाला, 'मी पुण्यश्लोक नल राजाच्या वंशांत जन्मलेला इन्द्रसेन राजाचा पुत्र आहे; माझे नाव चंद्रांगद असून मी चित्रवर्मा राजाचा जावई आहे.'८७. 'कालिंदी नदीत मी बुडाल्याचे स्मरते; पण मला इथे कुणी आणले ते माहीत नाही. माझ्या सद्भाग्याने आपले दर्शन झाले. हे माझ्या जन्माचे सार्थकच झाले!'८८.

**सृष्ट्यादिहेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयोऽप्यजः । कैलासे मूर्तिमद्योऽस्ति शम्भुर्नः कुलदैवतम् ।।८९।।**

**।। वासुकिरुवाच ।।**

**पूतोऽस्यत्र पुरे तिष्ठ भुञ्जन्भोगानमानुषान् । सुधाकल्पद्रुपूर्णे रुक्-शुग्भीनिद्रालयोनिते ।।९०।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**मां तु मत्वा मृतं नद्यां पितरौ मे मरिष्यतः । शोकार्तापि वधूर्वर्षे वर्तमाने विवाहिता ।।९१।।**

'सृष्टि+आदि+हेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयः अजः यो कैलासे मूर्तिमत् अस्ति (सः) शंभुः नः कुलदैवतम्।'८९। वासुकिः उवाच। 'पूतः असि! अत्र सुधा+कल्प+द्रु+पूर्णे शुक्+भी+निद्रा+लय+ऊनिते पुरे अमानुषान् भोगान् भुञ्जन् तिष्ठ।'९०। चन्द्राङ्गद उवाच। 'मे पितरौ मां तु नद्यां मृतं मत्वा मरिष्यति। शोकार्ता वधूः अपि वर्तमाने वर्षे विवाहिता।'९१।

मग चंद्रांगद आपण कुणाचे भक्त ते सांगत आहे. त्यातून त्याची आध्यात्मिक प्रगल्भता दृग्गोचर होते. तो म्हणतो, 'जगताच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचे कारण असणारा, मायेचाही नियंता, सर्व जीवमात्रांच्या अंतरांत राहून त्यांचे नियंत्रण करणारा, जीवापासून अभिन्न असा साक्षी, चैतन्यरूप आणि निर्विकार भगवान शिव, जो कैलासावर मूर्तरूपाने राहतो तोच आमचे कुलदैवत आहे. यावरून मूर्तिमंत शंकर मानवांना दृग्गोचर नसले तरी त्यांची उपासना परंपरेने आमच्या कुलांत चालत आलेली आहे असे सांगितले आहे. 'जो ज्याची उपासना करतो तो त्याच्यासारखाच होतो', या मुद्गल उपनिषदाच्या (३ः३) वचनानुसार चंद्रांगद हा शिवसायुज्याचा अधिकारी ठरतो.८९. वासुकी हे ऐकून प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'तू पावन आहेस. इथे पाताललोकातच राहून अलौकिक भोगांचा भोग घे. इथे अमृताचे साठे आहेत, कल्पवृक्षाच्या बागा आहेत. शोक, भय, निद्रा आणि मृत्यू यांची इथे वार्ताही नाही.'९०. चंद्रांगद उत्तरला, 'माझे मातापिता मी नदीत बुडून मेलो असे समजून प्राण देतील. माझे या वर्षीच लग्न झाले आहे. माझी शोकाकुल पत्नीसुद्धा माझ्याविना जगू शकणार नाही.'९१.

**श्रुत्वेति चेद्व्रजेत्युक्त्वा रत्नभूषामृतादिकम् । दत्वाऽह्यश्वौ मनोवेगौ गमयामास तौ स तु ॥९२॥**
**स ससर्पोऽश्वमारुह्य गच्छन् प्रेक्ष्य मनोजवः । कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं जगौ ॥९३॥**
**वधूः कस्यासि कन्या त्वं शोकार्तासि कुतोऽङ्गने । सा तच्छ्रुत्वा सखीं प्राह कथयास्मै सविस्तरम् ॥९४॥**

**॥ सख्युवाच ॥**

**चन्द्राङ्गदवधूश्चित्र-वर्मकन्येयमत्र तु । प्रियो नष्टस्तच्छुगार्ता स्नात्यत्राद्यास्ति सद्व्रतम् ॥९५॥**

(वासुकिः) इति श्रुत्वा 'व्रज' इति उक्त्वा मनो+वेगौ अहि+अश्वौ, रत्न+भूषा+अमृतादिकं दत्वा तौ गमयामास।९२। सः ससर्पः अश्वं आरुह्य मनोजवः कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं प्रेक्ष्य जगौ।९२। '(हे) अङ्गने, त्वं कस्य वधूः, कन्या असि? कुतः शोक+आर्ता असि?' सा तत् श्रुत्वा सखीं प्राह, 'अस्मै सविस्तरं कथय।'९३। सखी उवाच। 'इयं चन्द्राङ्गद+वधूः चित्रवर्म+कन्या। अत्र तु प्रियः नष्टः। तत्+शुक्+आर्ता। अद्य सत्+व्रतं अस्ति। (अतः) अत्र स्नाति।९५।

हे ऐकून वासुकी म्हणाला, 'मग तुला जायला पाहिजे.' त्याने त्याच्या साह्याकरता एक सर्प आणि मनासारखा वेगवान घोडा दिला. शिवाय दिव्य रत्ने, भूषणे, अमृत इत्यादि भेटीही दिल्या आणि त्या दोघांना निरोप दिला.९२. त्या नागाला बरोबर घेऊन घोड्यावर बसून तो चंद्रांगद मनोवेगाने कालिंदी नदीच्या तीरावर पोचला. त्या दिवशी नेमका सोमवारच असल्याने व्रताच्या अनुष्ठानासाठी सीमन्तिनीही तिथे आली होती. तिला सौभाग्यालंकारविरहित विधवेच्या वेषात पाहून तो खिन्न झाला. त्याने तिला विचारले.९३. 'बाईसाहेब, आपले पती कोण आहेत. पिता कोण आहेत? आणि आपण इतक्या दुःखीकष्टी का आहात?' त्यावर तिने आपल्या सहचरींना त्याला सर्व सविस्तर सांगायला सांगितले.९४. तिच्या सख्यांनी त्याला सांगितले, 'ही चंद्रांगदाची पत्नी आणि चित्रवर्म्याची कन्या आहे. इथेच ह्या नदीत तिचा पती बुडून मरण पावला. त्यामुळे ती शोकपीडित आहे. आज सोमवारचे व्रत असल्याने ही इथे स्नानासाठी आली आहे.९५.

**कारायां श्वशुरावस्याः संस्थाप्य बुभुजे स्वयम् । राज्यं रिपुः सोमवार-व्रतमेषा करोत्यतः ।९६।।**
**सीमन्तिन्यपि तद्रूपं दृष्ट्वा स्वपतिसन्निभः । कोऽयं धूर्तोऽसि यक्षो वा भाति वा स्वप्नहृद्भ्रमः ।।९७।।**
**इति मत्वा शुशोचैनामाश्वास्याहैष्यति त्र्यहात् । पुण्याद्भर्ता तवेत्युक्त्वा राष्ट्रं चन्द्राङ्गदो ययौ ।।९८।।**
**सापि तूष्णीं ययौ राष्ट्रं पितुश्चन्द्राङ्गदस्त्वरिम् । स्वागमं श्रावयामास स भीतो मुक्तवान्नृपम् ।।९९।।**
**द्विषा क्षमापितो मुक्तश् चन्द्रसेनः समागतम् । श्रुत्वा नष्टं सुतं वध्वा प्रेमाश्रूत्तोऽभवत्क्षणात् ।।१००।।**

अस्याः श्वशुरौ कारायां संस्थाप्य रिपुः स्वयं राज्यं बुभुजे। अतः एषा सोमवारव्रतं करोति।'९६। सीमंतिनी अपि तत्+रूपं दृष्ट्वा 'स्व+पति+सन्निभः कः अयं? धूर्तः अस्ति? यक्षः वा? स्वप्न+हृत्+भ्रमः वा भाति?'९७। इति मत्वा शुशोच। एनां आश्वास्य चन्द्राङ्गदः आह। 'तव पुण्यात् तव भर्ता त्रि+अहात् एति।' इति उक्त्वा (सः) राष्ट्रं ययौ।९८। सा अपि तूष्णीं पितुः राष्ट्रं ययौ। चन्द्राङ्गदः अरिं स्व+आगमं श्रावयामास। स भीतः नृपं मुक्तवान्। द्विषा क्षमापितः मुक्तः चन्द्रसेनः समागतं श्रुत्वा (नृपः) वध्वा प्रेम+अश्रूत्तः अभवत्।९९।

हिच्या सासूसासऱ्यांना बंदीशाळेत टाकून शत्रूंनी त्यांचे राज्य बळकावले आहे. तरी ही सोमवार व्रत करीत असते.'९६. त्या वेळी सीमंतिनीने त्याचे रूप निरखून पाहिले तेव्हां, 'हा आपल्या पतीसारखाच दिसतो आहे. कोण असेल हा? कुणी तोतया किंवा यक्ष असेल का? की माझ्या मनाचा हा खेळ नसेल ना? की हे स्वप्नच आहे?'९७. अशा विचारांनी कासावीस होऊन ती रडू लागली. चंद्रांगदाने तिचे सांत्वन केले. म्हणाला, 'शोक करू नकोस. तुझ्या पुण्याईने तुझा पती तीन दिवसात परत येईल.' असे बोलून तो आपल्या राज्याकडे निघून गेला.९८. तीसुद्धा आपल्या पित्याच्या नगरीला परतली. पण ही हकीकत तिने कुणालाही सांगितली नाही. चंद्रांगदाने आपले राज्य बळकावलेल्या शत्रूंना आपल्या आगमनाची सूचना दिली. त्यांनी घाबरून इंद्रसेन राजाला कारागृहातून सोडले(९९) आणि त्याची क्षमा मागितली. राजा आणि राणी चंद्रांगदाच्या आगमनाची वार्ता ऐकून आनंदाने गहिवरले.१००.

**अलङ्कृतं पुरं सोऽपि प्रविश्य पितरौ दृढम् । समालिङ्ग्यादितः सर्वं शशंस पुलकाङ्कितः ।।१०१।।**
**सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्पित्रनुज्ञया । गत्वा श्वशुरराष्ट्रं स्व-भार्याशोकं जहार सः ।।१०२।।**
**आनीतानर्घवस्तूनि तस्यै दत्वा तया सह । राज्यमेत्याभिषिक्तः स जिष्णुवद्बुभुजे श्रियम् ।।१०३।।**
**इयान् व्रतप्रभावस्तद्-व्रतं कुर्वित्यजोऽब्रवीत् । ततः प्रभृत्युभौ भक्त्या चेरतुर्व्रतमुत्तमम् ।।१०४।।**
**गुर्वाज्ञयेयितुर्गेहं प्रत्यब्दं गुरुदर्शनम्। कृत्वा श्रीपुत्रपौत्राढ्यावुभयीं सिद्धिमापतुः ।।१०५।।**

सः अपि अलङ्कृतम् पुरं प्रविश्य पितरौ दृढं समालिङ्ग्य पुलकाङ्कितः सर्वं आदितः शशंस।१०१। सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्। पितृ+अनुज्ञया श्वशुर+राष्ट्रं गत्वा सः भार्या+शोकं जहार।१०२। आनीत+अनर्घ+वस्तूनि तस्यै दत्वा तया सह राज्यं एत्य अभिषिक्तः सः जिष्णुवत् श्रियं बुभुजे।१०३। इयान् व्रत+प्रभावः। 'तत् व्रतं कुरु।' इति अजः अब्रवीत्। ततः प्रभृति उभौ उत्तमं व्रतं भक्त्या चेरतुः।१०४। गुरु+आज्ञया गेहं ईयतुः। प्रति अब्दं गुरु+दर्शनं कृत्वा उभयीं सिद्धिं आपतुः।१०५।

चंद्रांगदही सजविलेल्या नगरात प्रवेश करून मातापित्यांना कडकडून भेटला. प्रेमभराने त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्याने त्यांना सर्व हकीकत सविस्तर निवेदन केली.१०१. आपल्यासोबत आलेल्या सर्पाचा सत्कार करून त्याला त्याच्या राज्याला - पाताळाला बोळविले. नंतर आपल्या वडिलांची अनुज्ञा घेऊन सासऱ्याच्या राज्याला जाऊन त्याने आपल्या पत्नीचे दुःख निवारण केले.१०२. पाताळातून आणलेल्या मौल्यवान वस्तू तिला देऊन तिला प्रसन्न केले. नंतर तिला घेऊन तो आपल्या नगरीला परतला. तिथे इंद्रसेनाने त्याला राज्याभिषेक केला. अशा रीतीने त्याने सीमन्तिनीसह इंद्राप्रमाणे ऐश्वर्य भोगले.१०३. ही कथा सांगून श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, 'असा हा सोमवारव्रताचा प्रभाव आहे. तरी तू हे व्रत कर!' तेव्हापासून ती दोघे दंपती त्या उत्तम व्रताचे आचरण करू लागले.१०४. नंतर श्रीगुरूंची आज्ञा घेऊन ते आपल्या घरी माहुरला गेले. दर वर्षी त्यांचा श्रीगुरूंच्या दर्शनाला येण्याचा नियम होता. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही सिद्धी त्यांना लाभल्या.१०५.

**एवं जगन्मङ्गलमङ्गलात्मा मनुष्यभावात्परिगृह्य भक्तान् ।**
**सञ्चारपूतां जगतीं विधाय ततान लीलाममलामघघ्नीम् ।।१०६।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे दम्पतीगुरुसंवादो नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः सप्तदशोऽध्यायः ।।१७।।**

**सप्ताहपारायणे चतुर्थः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम्। द्वितीयदिने आरम्भे श्रीगुरुस्तुतिः।**

एवं जगत्+मङ्गल+मङ्गल+आत्मा मनुष्य+भावात् जगतीं सञ्चार+पूतां विधाय अमलां अघघ्नीं लीलां ततान।१०६।

अशा प्रकारे जगाला सुखवणाऱ्या आनंदस्वरूप परमात्म्याने मनुष्यरूपाने भक्तांचा उद्धार करीत संचार करून ह्या भूतलाला पावन केले आणि आपल्या सर्व पावक आणि पापहारी लीलांचा विस्तार केला.

**समारोप -** सुवासिनींना पातिव्रत्यधर्मानेच ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधते, दुसरा कोणताही धर्म नाही; तसेच पतीच्या मृत्यूनंतर सहगमन हाच स्त्रीचा मुख्य धर्म आहे. ते शक्य नसेल तर तिने वैधव्यधर्माचे पालन करावे. तसे केल्याने निपुत्रिक स्त्रीलासुद्धा ब्रह्मचाऱ्यासारखी स्वर्गप्राप्ती होते. हे सर्व प्रतिपादन मागच्या (सोळाव्या) अध्यायात केले या अध्यायात संवादरूपाने स्त्रियांना मंत्राचा अधिकार नसला तरी व्रताच्या आचरणाने उभयतः कल्याण होते असे सांगून **स्त्रियांना मोक्षप्राप्तीमध्ये स्वातंत्र्य** आहे असे स्पष्ट केले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला चौथा आणि प्रथमपासून सतरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अष्टादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**निद्रितं मोहतम्यां मे मनोऽहङ्कारघूर्णितम् । बोधार्कोदयबुद्धं तत् पातुमैच्छत्कथामृतम् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**वत्स विष्णौ प्रबुद्धोऽसि यत्तृप्तिः शृण्वतोऽपि नो । मन्ये त्वयि प्रसादोऽस्ति श्रीमद्भगवतो हरेः ।।२।।**
**शृण्वेको ब्राह्मणस्तत्र त्यक्तान्यान्नप्रतिग्रहः । दैवाप्तभुगृती शान्तोऽसक्तः कर्मपरो गृही ।।३।।**

नामधारक उवाच। मोह+तम्यां निद्रितं अहङ्कार+घूर्णितं मे मनः बोध+अर्क+उदय+बुद्धं तत् कथा+अमृतं पातुं ऐच्छत्।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स विष्णौ प्रबुद्धः असि यत् शृण्वतः अपि नो तृप्तिः। श्रीमत्+भगवतः हरेः त्वयि प्रसादः अस्ति (इति) मन्ये।२। शृणु। तत्र एकः त्यक्त+अन्न+प्रतिग्रहः दैव+आप्त+भुक् ऋती शान्तः असक्तः कर्मपरः गृही ब्राह्मणः (अभूत्)।३।

श्रीगणेशाय नमः। अथाऽष्टादशोध्यायः। *ब्राह्मणीचा स्वभाव सुधारुनि अठराव्यांत। सांगती अखिल कर्मकांड श्रीगुरुनाथ।।१।।* नामधारक म्हणाले, ‘मोहरूपी रात्रीत झोपलेले - आत्मस्वरूपाला विसरलेले, माझे मन आपल्या बोधरूपी सूर्याच्या उदयाने जागे झाले आहे. भानावर आले आहे. त्यामुळे मी श्रीगुरूंच्या लीलारूपी अमृताच्या पानाला उत्सुक झाले आहे.’१. सिद्ध म्हणतात, ‘बेटा! ज्या अर्थी इतका वेळ श्रवण करूनही तुला तृप्ती न वाटता अधिकच ऐकण्याची इच्छा होते आहे त्या अर्थी तू खरेच व्यापक श्रीगुरूंच्या विषयी जाग्रत झाला आहेस. तुझ्यावर त्या हरीचा, भगवंताचा कृपाप्रसाद झाला आहे असे मला वाटते.’२. ऐक तर! तिथे गाणगापुरात परान्नाचा त्याग केलेला, दैवाने मिळेल तेच संतोषाने सेवन करणारा, सत्यवचनी, शांत, कर्मनिष्ठ पण अनासक्त वृत्तीचा एक गृहस्थ ब्राह्मण राहत होता.३.

**तत्स्त्रीः कृत्येव सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वान्यसद्मनि । लभन्ते स्वंशुकार्थास्तद् दृष्ट्वा पतिमगर्हयत् ।।४।।**
**भोक्तुं भर्त्रा सहाहूता धनिनैकेन सैकदा । पत्याऽक्रुट्कामलोभेन निषिद्धैत्यावदद्गुरुम् ।।५।।**
**दीनां कुचैलां क्षुधितां पत्या साकं धनी गृहे । दाताह्वयति भोक्तुं मां पतिं बोधय नैति सः ।।६।।**
**तच्छ्रुत्वाहूय तं गच्छ भोक्तुं वध्वेत्यजोऽब्रवीत् । स प्राह नियमं हित्वा तथा कुर्वे त्वदाज्ञया ।।७।।**

तत्+स्त्रीः कृत्या इव। अन्य+सद्मनि सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वा सु+अंशुकाः अर्थान् (च) लभन्ते। तत् दृष्ट्वा पतिं अगर्हयत्।४। सा एकदा भर्त्रा सह भोक्तुं आहूता। अ+क्रुट्+काम+लोभेन पत्या निषिद्धा। (सा) गुरुं एत्य अवदत्।५। दीनां कुचैलां क्षुधितां मां धनी दाता पत्या साकं गृहे आह्वयति। सः न एति। पतिं बोधय।६। तत् श्रुत्वा अजः तं आहूय अब्रवीत् वध्वा भोक्तुं गच्छ। सः प्राह, नियमं हित्वा त्वत्+आज्ञया तथा कुर्वे। ७।

त्याची पत्नी मात्र कर्कशा आणि दुष्ट स्वभावाची होती. गाणगापूरला येणाऱ्या श्रीमंत लोकांकडे जाऊन सगळे गोडधोड खातात; शिवाय त्यांना चांगलीचुंगली वस्त्रे आणि दक्षिणाही मिळते हे पाहून तिला कुणाचेही निमंत्रण न स्वीकारणाऱ्या आपल्या नवऱ्याचा तिरस्कार वाटत असे.४. तिला एकदा एका धनवंताने पतीसह भोजनाचे आमंत्रण दिले. तिच्या क्रोध-काम-लोभरहित पतीने तिला जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हा ती श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना नवऱ्याचे गाऱ्हाणे सांगू लागली.५.

'पहा ना गुरुमहाराज! आम्ही कायमचेच दरिद्री आहोत. ना पोटभर अन्न ना अंगभर वस्त्र कधी असते! आज एका दानशूर श्रीमंताने त्याच्या घरी आम्हाला दोघांना जेवायला बोलावले आहे. पण हे कांही ऐकायलाच तयार नाहीत. तुम्हीच त्यांना सांगा. कधी तरी पोटभर गोडधोड खायला मिळेल!'६. तिचे ते बोलणे ऐकून श्रीगुरूंनी तिच्या पतीला बोलावून घेतले आणि त्याला आपल्या पत्नीसह भोजनाला जायला सांगितले. तो म्हणाला, 'मी माझा नियम मोडूनसुद्धा आपल्या आज्ञेचे पालन करीन.'७.

**इत्युक्त्वागात्तया भोक्तुं श्वक्रोडोच्छिष्टपाकतः । भुञ्जन्ती ददतेऽन्नं सा दृष्ट्वा पत्ये शशंस तत् ।।८।।**
**उत्थायोभौ ततः खिन्नौ गुरुं प्राप्य तदूचतुः । स प्राहाङ्गाद्य लब्धं ते स्त्रीः परान्नसुखं परम् ।।९।।**
**सोचेऽद्य च्छलितो भर्ता क्षन्तव्यो मन्तुरद्य मे । तामाह श्रीगुरुरितः पत्यनुज्ञानुगा भव ।।१०।।**

**।। विप्र उवाच ।।**

**निष्ठाऽन्यथा कृता मेऽद्य दुष्टयाघं कथं व्रजेत् । जन्मप्रभृत्यद्य यावन् नेदृक्पापं मया कृतम् ।।११।।**

इति उक्त्वा तया भोक्तुं अगात्। भुञ्जन्ती सा श्व+क्रोड+उच्छिष्ट+पाकतः अन्नं ददते (इति) दृष्ट्वा तत् पत्ये शंशस।८। ततः उभौ खिन्नौ उत्थाय गुरुं प्राप्य तत् ऊचतुः। सः प्राह। (हे) अङ्ग स्त्रीः अद्य ते परं परान्न+सुखं लब्धं (किम्)?९। सा ऊचे। 'अद्य (मया) भर्ता छलितः। मे मन्तुः क्षन्तव्यः।' श्रीगुरुः तां आह। 'इतः पति+अनुज्ञा+अनुगा भव।'१०। विप्र उवाच। 'अद्य दुष्टया मे निष्ठा अन्यथा कृता। अघं कथं व्रजेत्? जन्म+प्रभृति अद्य यावत् ईदृक् पापं मया न कृतम्।'११।

असे बोलून तो ब्राह्मण आपल्या स्त्रियेसह जेवायला गेला. तिथे जेवताना तिला दिसले की कुत्र्यांनी आणि डुकरांनी उष्टावलेले अन्नच वाढण्यात येत आहे. तिने ते आपल्या पतीला सांगितले.८. तेव्हा ते दोघेही जेवण टाकून उठले आणि श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना ते सर्व वृत्त सांगितले. ते म्हणाले, 'बाई गं! तुला आज परान्नभोजनाचे परमसुख मिळाले ना?'९. ती म्हणाली 'आज मी खरोखर पतीचा छळ केला. माझ्या ह्या अपराधाची क्षमा असावी.' त्यावर श्रीगुरू तिला म्हणाले 'इथून पुढे तू पतीच्या आज्ञेत राहा.'१०.

तो ब्राह्मण म्हणाला, या दुष्ट स्त्रीने माझ्या नियमाचा भंग करविला. आता हे पाप कसे जाईल? मी जन्मापासून आजपावेतो असे पाप केले नव्हते.११.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीस्त्वय्येष दोषो न दुश्चित्तं न कुलस्त्रियः । कार्यं सातः परं नेच्छेत् तथात्तुं क्वापि नैह्यतः ।।१२।।**
**कदाचिद्यस्य कस्यापि कर्माभाव उपस्थिते । द्विजाभावात्तु भोक्तव्यं तत्र दोषोऽन्यथा भवेत् ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**परान्नं कस्य भोक्तव्यं कस्मिन्गेहे न कुत्र वा । कस्माद्दानं गृहीतव्यं निषिद्धं चापि शंस मे ।।१४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सद्विप्रवैदिकगुरुश्वशुरस्वशिष्य-मातामहालय उ भोजनतो न दोषः ।**
**नाऽचारहीनपरकर्मरताहितार्त-क्षुद्राशुचिस्वगुरुदुःखकरान्नमद्यात् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। एष त्वयि न दोषः। कुलस्त्रियः दुश्चित्तं न कार्यम्। सा अतः परं तथा न इच्छेत्। (त्वं) अतः (परं) क्व अपि अत्तुं न एहि।'१२। 'कदाचित् यस्य कस्य अपि द्विज+अभावात् कर्म+अभाव उपस्थिते तु भोक्तव्यम्। अन्यथा तत्र दोषः भवेत्।'१३। विप्र उवाच। परान्नं कस्य भोक्तव्यम्? कस्मिन् गेहे कुत्र वा न (भोक्तव्यम्)? कस्मात् दानं गृहीतव्यम्? (कस्मात्) निषिद्धम्? मे शंस।१४। श्रीगुरुः उवाच। 'सद्विप्र+वैदिक+गुरु+श्वशुर+स्व+शिष्य+मातामह+आलये भोजनतः न दोषः। आचारहीन+परकर्मरत+अहितार्त+क्षुद्र+स्व+गुरु+दुःख+कर+अन्नं न अद्यात्।'१५।

श्रीगुरू म्हणाले, 'हा दोष तुला लागणार नाही; कारण आपल्या धर्मपत्नीचे मन राखायला हवे. तीसुद्धा यापुढे तशी धर्मविरुद्ध इच्छा करणार नाही. तूसुद्धा यानंतर कुणाकडेही जेवायला जाऊ नकोस.१२. मात्र याला अपवाद आहे. एखाद्याचे श्राद्धादि कर्म भोजनाला ब्राह्मण न मिळाल्याने जर अडले असेल तर मात्र तिथे जेवायला हवे. अन्यथा म्हणजे कर्मलोपावाचून इतर कारणाने - जिभेचे चोचले पुरविण्यासाठी जेवल्यास मात्र दोष आहे. किंवा तिथे कर्मलोप होत आहे हे जाणूनही दुराग्रहाने न जेवल्यासही दोष लागतो.'१४. ब्राह्मणाने विचारले की, गुरुमहाराज! कुणाकडचे परान्न पवित्र असते? कुणाकडे घ्यावे आणि कुणाकडे घेऊ नये? तसेच कुणाचे दान घ्यावे आणि कुणाचे निषिद्ध आहे? ते आपण मला सांगावे. श्रीगुरू म्हणाले, 'सदाचारी ब्राह्मण अध्यापक; अन्नदाता, भयहर्ता इत्यादि, गुरू; सासरा; बांधव;

**दातारमेति सततं सुकृतं तदन्न-भुक्त्यास्य भोक्तुरघमेति तथाप्यमन्त्रात् ।**
**हूत्याङ्घ्रिजस्य च तथा खलु मासपुण्यं दर्शे परान्नग्रहणादपयाति भोक्तुः ।।१६।।**
**कन्यालयेऽर्भजननोत्तरमन्नमद्याल् लक्ष्मीरपैति सततं परगेहवासात् ।**
**ग्राह्यं च दानमपि सज्जनतो ग्रहे सत् क्षेत्रादिके न न कुहाप्यतिनिन्द्यदानम् ।।१७।।**
**उत्तमं यज्ञशिष्टान्नं दीक्षितब्रह्मिणोरपि । स्वार्थं पक्तं क्वापि नाद्याादद्याद्यज्ञार्पितं शुभम् ।।१८।।**

सततं तत्+अन्न+भुक्त्या भोक्तुः सुकृतं दातारं एति। अस्य अघं (भोक्तुं) एति। अङ्घ्रिजस्य हूत्या तथा एव। दर्शे परान्न+ग्रहणात् भोक्तुः मास+पुण्यं अपयाति।१६। कन्या+आलये अर्भ+जनन+उत्तरं अद्यात्। सततं पर+गेह+वासात् लक्ष्मीः अपैति। सज्जनतः दानं ग्राह्यम्। क्षेत्रादिके न सत्। अतिनिन्द्यदानं न कुह अपि।१७। यज्ञ+शिष्ट+अन्नं उत्तमम्। दीक्षित+ब्रह्मिणोः अपि। स्व+अर्थं पक्तं क्व अपि न अद्यात्। यज्ञ+अर्पितं शुभं (अन्नं) अद्यात्।१८।

शिष्य; मातामह यांच्या घरी जेवल्यास दोष नाही. मात्र आचारहीन, परकर्मांत रमणारा, लोभादि रिपूंनी अभिभूत झालेला, कृपण, आपल्या कुटुंबीयांना किंवा गुरूंना कष्ट देणारा यांचे अन्न घेऊ नये.'१५. सतत एखाद्याच्या घरी जेवण घेतल्याने जेवणाऱ्याचे पुण्य जेवू घालणाऱ्याला जाते; तसेच त्याचे पाप जेवणाऱ्याला जाते. शूद्राकरवी ब्राह्मणाच्या घरचे भोजनाचे आमंत्रण आल्यास त्याचप्रमाणे पुण्य-पाप जाते-येते. दर्शादिवशी (अमावास्या) परान्न घेतले तर महिन्याभराचे पुण्य अन्नदात्याला जाते व त्याचे पाप आपल्याला येते.१६. मुलीच्या घरी तिला एक अपत्य झाल्यावर जेवावे. सतत दुसऱ्याच्या घरी राहण्याने लक्ष्मी जाते. सत्प्रवृत्त, स्वधर्मनिष्ठ व्यक्तीकडून दान घ्यावे. पण ते तीर्थाच्या वा क्षेत्राच्या ठिकाणी अथवा ग्रहणादि पर्वांत घेऊ नये. निंद्य दान किंवा महादान कधीही घेऊ नये. सुवर्ण, हत्ती, घोडा, तीळ, दासी, रथ, भूमी, घर, वधू आणि कपिला गाय ही अग्निपुराणात महादाने सांगितली आहेत.१७. यज्ञांत अर्पण करून उरलेले अन्न उत्तम होय. तसेच अग्निहोत्रादि दीक्षा घेतलेल्या ब्राह्मणाचे अन्नही उत्तमच आहे. केवळ आपल्यासाठी शिजवलेले अन्न कुणीही घेऊ नये. यज्ञात अर्पण केलेले पवित्र अन्नच घ्यावे.१८.

**नश्येज्जपादापदि दानदोषः स्वाचारमप्यापदनापदिष्टम् ।**
**विविच्य विप्राः प्रचरन्ति ये न क्वाप्याधिदैन्यर्णगदान्स्पृशन्ति ॥१९॥**
**स्वाचारहीनाः परकर्मसक्तास्तेऽमुत्र चात्रापि सदार्तिभाजः ।**
**तस्माद् द्विजाचारममुं निराशीस् त्वं कर्तुमर्हस्युभयार्थदं वै ॥२०॥**

**॥ विप्र उवाच ॥**

**देवदेव जगन्नाथ दयाब्धे भगवन्प्रभो । सद्गुरो सर्वमाचारं वक्तुमर्हसि मे हरे ॥२१॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**विस्तृतोऽब्धिवदाचारो मुनीनामपि दुर्ग्रहः । तस्मात्सारं सद्गतिदं वक्ष्ये शाक्त्यादिसंमतम् ॥२२॥**

आपदि दान+दोषः जपात नश्येत्। स्व+आचार अपि आपत्+अनापत्+इष्टं विविच्य ये विप्राः प्रचरन्ति (ते) क्व अपि आधि+दैन्य+ऋण+गदान् स्पृशन्ति।१९। स्व+आचार+हीनाः पर+कर्म+सक्ताः ते अमुत्र च अत्र अपि सदा आर्ति+भाजः। तस्मात् (हे) द्विज, अमुं आचारं त्वं निराशीः कर्तुं अर्हसि। (तत्) वै उभय+अर्थदम्।२०। विप्र उवाच। '(हे) देवदेव, (हे) जगन्नाथ, (हे) भगवन्, (हे) प्रभो, (हे) सद्गुरो (हे) हरे! मे सर्वं आचारं वक्तुं अर्हसि।'२१। श्रीगुरुः उवाच। 'अब्धिवत् विस्तृतः आचारः मुनीनां अपि दुर्ग्रहः। तस्मात् सद्गतिदं शाक्त्य+आदि+संमतं सारं वक्ष्ये।२२।

संकटामुळे घडलेल्या परिग्रहाचा दोष गायत्रीजपाने किंवा '*पुनर्मामैतु*' इत्यादि दोन मंत्रांच्या जपाने जातो. (आश्वलायन गृह्यसूत्र ३:६:९-१) संकटांत किंवा संकट नसताना कोणता आचार इष्ट आहे ह्याचा विचार करून जे ब्राह्मण वागतात त्यांना, मानसिक आधि, दारिद्र्य, ऋण किंवा रोगराई स्पर्शही करू शकत नाहीत.१९. आपल्या विहित आचाराचा त्याग करून दुसऱ्याचे कर्मांत रमणारे या भूलोकांत किंवा परलोकांतही दुःखच पावतात. त्यासाठी हे ब्राह्मणा, हा आचार तू निष्काम रीत्या करावास. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिकही कल्याण साधते.२०. यावर त्या ब्राह्मणाने महाराजांची प्रार्थना केली, 'देवाधिदेवा, जगदीशा, भगवंता, दयासागरा, समर्था, सद्गुरो! आपण मला सर्व आचार सांगावा!'२१.

**आचार आद्यो धर्मो नुः सुखदस्तूभयत्र सः । श्रुतिस्मृतिपुराणोक्त-चरणं विष्णुचिन्तनम् ।।२३।।**
**श्रद्धया देशकालाप्त-दानं पात्रे दया क्षमा । शौचानसूयानायासाऽतृट्ताकार्पण्यमङ्गले ।।२४।।**
**सत्ता दैवीसम्पदेतल् लक्षणो धर्म उच्यते । श्रैष्ठ्यं कर्माप्यते तस्मात्ततो ज्ञानं ततोऽमृतम् ।।२५।।**

आचारः आद्यः धर्मः। स तु नुः उभयत्र सुखदः। श्रुति+स्मृति+पुराण+उक्त+चरणम्; विष्णु+चिन्तनम्;।२३। श्रद्धया पात्रे देश+काल+आप्त+दानम्; दया+क्षमा+शौच+अनायास+अतृट्ता+अकार्पण्य+मङ्गले।२४। सत्ता, दैवी+संपत् एतत् लक्षणः धर्मः उच्यते। तस्मात् कर्म श्रेष्ठ्यं आप्यते। ततः ज्ञानम्। ततः अमृतम्।'२५।

श्रीगुरू सांगू लागले, आचार सागराप्रमाणे विशाल आहे. ऋषी-मुनींनाही त्याचे ज्ञान होणे दुरापास्त आहे. त्यांतील पराशरादि स्मृतिकारांनी मानलेले सार मी तुला सांगत आहे.२२. 'आचार हा पुरातन धर्म आहे. तोच मानवाला इह आणि परत्र सुखदायक आहे. धर्माची लक्षणे अशी आहेत.(१) श्रुति, स्मृति आणि पुराणांत सांगितल्याप्रमाणे वागणे; (२) श्रद्धापूर्वक, योग्य व्यक्तीला, योग्य देशी, योग्य काळी आपल्या ऐपतीप्रमाणे दान करणे; (३) दया, (४) क्षमा, (५) शौच (पावित्र्य), (६) अधिक सायास न करणे, (७) वितृष्णा (निरिच्छा), (८) कृपणतेचा अभाव, (९) मंगलकारक कर्म करणे, (१०) आस्तिक्य आणि दैवी संपत्ती. दैवी संपत्ती म्हणजे शम, दम, तितिक्षा, समाधान, उपरती आणि मुमुक्षा; किंवा भगवद्गीतेत (१६:२-३) सांगितल्याप्रमाणे अहिंसा सत्य, अक्रोध, त्याग, शान्ती, अपैशुन (परनिंदा न करणे), भूतदया, इंद्रियांवर ताबा, मार्दव, दुराचरणाची लज्जा, चंचलता नसणे, तेज, धैर्य, शौच, अद्रोह आणि निरभिमानता. (*अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्।। तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानता। भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत।।*) या धर्माच्या आचरणानेच कर्माला श्रेष्ठता येते. श्रेष्ठ कर्माचरणानेच आत्मज्ञान लाभते आणि आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो.२३-२५.

**श्रुतिस्मृतिपुराणानि धर्ममूलं श्रुतिर्वरा । तद्वैरे द्वौ वृषौ श्रुत्योर्द्वैधे स्मृत्योस्तु लौकिकः ।।२६।।**
**वर्णाश्रमविभागोक्तो देशकालोचितो वृषः । लौकिकोऽपि चतुर्वर्णैः सेवनीयः प्रयत्नतः ।।२७।।**

श्रुति+स्मृति+पुराणानि धर्म+मूलम्। तत् वैरे श्रुतिः वरा। श्रुत्योः द्वैधे द्वौ वृषौ। स्मृत्योः (द्वैधे) लौकिकः।२६। वर्ण+आश्रम+विभाग+उक्तः देश+काल+उचितः वृषः चतुर्वर्णैः लौकिकः अपि प्रयत्नतः सेवनीयः।२७।

श्रुती (वेद), स्मृती आणि पुराणे हेच धर्माचे मूळ आहेत. ह्यांच्यांत परस्पर विरोध आला तर श्रुतिवचनच श्रेष्ठ ठरते. दोन श्रुतींत विरोध उत्पन्न झाल्यास दोन धर्म होतात. दोन स्मृतींत विरोध असेल तर लौकिक धर्माला अनुकूल अशा स्मृतीने सांगितलेल्या धर्माचा अंगीकार करावा.२६. हा धर्म ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी हे चार आश्रम यांच्यासाठी वेगवेगळा सांगितलेला आहे. तसेच त्यात देश, काल यांचा विचारही केलेला आहे. हा चारी वर्णानी प्रयत्नपूर्वक आचरणांत आणला पाहिजे. 'त्रैलोक्याची रचना करण्याचे सामर्थ्य असलेल्या ब्रह्मदेवाची पदवी प्राप्त झाली तरी लौकिक आचाराचे मनानेसुद्धा उल्लंघन करू नये' असे शास्त्रवचन आहे. महाभारतांत (१८:५:६३) सांगितले आहे की, कसल्याही कामनेसाठी, कुणाच्याही भयाने किंवा कशाच्याही लोभाने, अगदी जीव वांचविण्यासाठीही धर्माचा त्याग करू नये. सुख आणि दुःख हे अनित्य आहेत तर धर्म नित्य आहे. जीव नित्य आहे, त्याच्या उपाधी अनित्य आहेत (*न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः। धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः।।*)२७.

**स्वनुष्ठितादन्यधर्माद् विगुणोपि स्वको वरः । स्वगृह्योक्तोऽविरुद्धोऽपि स्मार्तो ग्राह्यो द्विजातिभिः ॥२८॥**
**नित्यं नैमित्तिकं कर्म नातीयात्काम्यमैच्छिकम् । तत्त्यागी क्वापि न सुखी ब्रह्मीभूतमृते भवेत् ॥२९॥**

सु+अनुष्ठितात् अन्य+धर्मात् विगुणः अपि स्वकः वरः। द्विजातिभिः स्वगृह्य+उक्तः अविरुद्धः स्मार्तः अपि ग्राह्यः।२८। नित्यं नैमित्तिकं कर्म न अतीयात्। काम्यं ऐच्छिकम्। तत्+त्यागी ब्रह्मीभूतं ऋते क्व अपि न सुखी भवेत्।२९।

भगवद्गीतेच्या प्रतिपादनानुसार (३:३५) उत्तम प्रकारे आचरलेल्या परधर्मापेक्षा यथातथा आचरलेला आपला विहित धर्म श्रेष्ठ आहे. स्वधर्मांत मृत्यूही आला तरी कल्याणप्रद आहे; परधर्म भयावह आहे आहे (*श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥*).

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या त्रैवर्णिकांनी आपापल्या शाखेचा गृह्योक्त धर्म आचरावा. त्याच्याशी विरोध नसलेला स्मार्त धर्मही सर्वांना ग्राह्य आहे. *'सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात्'* ब्रह्मसूत्रानुसार (३:३:१) शाखाभेद जरी असला तरी विधींत भेद नसल्याने उपासनेत फरक पडत नाही.२८. संध्योपासना, होम, पंचमहायज्ञ, दर्शादि कर्मे नित्य होत; जातकर्मादि कर्मे नैमित्तिक होत. ही न केल्यास प्रत्यवाय दोष लागतो. यासाठी ती कधीही चुकवू नयेत. काम्यकर्म न केल्याचा कांही दोष शास्त्रांत सांगितलेला नाही. शिवाय ती केल्याने बंधक होऊ शकतात. (*अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते* भ.गीता ५:१२) 'तर मग काम्य कर्मे करूच नयेत असे का सांगीतले नाही?' असे विचाराल तर त्याचे नियमन आसक्त आणि अनासक्त यांच्यासाठी वेगवेगळे केले आहे. तैत्तिरीय उपनिषदांत '*आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः*' (१:११:१) असे वचन आहे. त्यावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे. 'आचार्यांची अनुज्ञा घेऊन अनुरूप पत्नीचे पाणिग्रहण करून प्रजातंतूचा विच्छेद करू नये. पुत्र झाला नाही तर तो व्हावा म्हणून काम्यादि कर्मांचे अनुष्ठान करावे. हे विवेचन आसक्त लोकांसाठी आहे. *लोकोऽपुत्रस्य नास्ति* ह्या

**प्रमादलुप्तकर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिर्विना । अनुतप्तं प्रयत्नाद्धी-दुःसङ्गापहृतक्रिया ।।३०।।**

प्रमाद+लुप्त+कर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिः। दुःसङ्ग+अपहत+क्रिया हि प्रयत्नात्। विना अनुतप्तम्।३०।

श्रुतीचे मर्म जाणणाऱ्या विरागी लोकांसाठी मात्र बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) वित्तैषणा, लोकैषणा आणि दारैषणा ह्या तिन्हींचा त्याग सांगितला आहे. अशा लोकांना जर तीव्रतर मुमुक्षा असेल तर त्यांनी संन्यास ग्रहण करणेच श्रेयस्कर आहे. इतर आरुरुक्षूंना नित्यनैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान विहित आहे. पण जे मोक्षाला विमुखच आहेत त्यांच्यासाठी काम्यकर्माचे प्रतिपादन केले आहे.

नित्य-नैमित्तिक कर्म सोडणाऱ्याला ना इथे - इहलोकांत, सुख आहे ना परलोकी. याला अपवाद फक्त आत्मसाक्षात्कारी पुरुषाचा आहे. *यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तिश्च मानवः। आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।। नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः।।* भ.गीता ३:१७-१८।। जो आत्मसुखांतच रमलेला आहे, आत्म्यातच तृप्त आहे आणि आत्म्यानेच संतुष्ट आहे त्याला कांहीही कर्म करण्याची आवश्यकता नाही. त्याला न कर्म करण्याचे कांही प्रयोजन असते न कर्म न करण्याचे! त्याला कुणाही जीवापासून कांहीच स्वार्थ साधायचा नसतो.२९.

ज्याचे कर्म अनवधानाने लुप्त झाले आहे त्याची शांडिल्य श्रौतसूत्रानुसार (३:१९:१) प्रायश्चित्ताने शुद्धी होते. वाईट संगतीला लागून, बुद्धिपूर्वक ज्याने आपले कर्म सोडले असेल त्याला शुद्धीसाठी प्रयत्नांची आवश्यकता आहे. याला अपवाद पश्चात्तापाचा आहे. पश्चात्तापाने लगेच शुद्धी होते. पण पश्चात्ताप झाला पाहिजे. तो ईश्वर, गुरू किंवा संत यांच्या कृपेविना होत नाही.३०.

**भजेत्सलक्षणं धर्मं श्रद्धाभक्तियुतो नरः । ब्राह्मणस्तु विशेषेण यतोऽस्मै श्रैष्ठ्यमर्पितम् ।।३१।।**
**दानादाने याजनेज्येऽध्ययनाध्यापने द्विजः । स्नानसन्ध्याजाप्यहोम-पाठयज्ञपरश्चरेत् ।।३२।।**
**वैदिकां तान्त्रिकां मिश्रामाद्यां वैकां चरेत्क्रियाम् । विमलः सुमुखस्नातो द्विराचान्तो गुरूक्तिमान् ।।३३।।**
**त्रिकच्छी धौतसच्छुष्क-द्विवासा यतगोशिखः । मृद्भस्मगन्धान्यतम-लिप्तो दर्भकरः शुचिः ।।३४।।**

श्रद्धा+भक्ति+युतः नरः सलक्षणं धर्मं भजेत्। विशेषतः ब्राह्मणः यतः अस्मै श्रैष्ठ्यं अर्पितम्।३१।स्नान+सन्ध्या+जाप्य+होम+पाठ+यज्ञ+परः द्विजः दान+आदाने, याजन+इज्ये, अध्ययन+अध्यापने चरेत्।३२। वैदिकां तान्त्रिकां मिश्रां वा एकां आद्यां क्रियां चरेत्। विमलः, सुमुखः, स्नातः, द्विः+आचान्तः, गुरु+उक्ति+मान्,।३३। त्रिकच्छी, धौत+सत्+शुष्क+द्विवासा, यत+गो+शिखः, मृत्+भस्म+गन्ध+अन्यतम+ लिप्तः, दर्भकरः, शुचिः।३४।

प्रत्येक माणसाने आपल्या धर्माचे यथासांग आचरण करायला हवे. विशेषतः ब्राह्मणांनी; कारण सर्व वर्णांत त्यांना मोठेपणा दिलेला आहे.३१. स्नान, संध्या, जप, होम, वेदपठण, यज्ञ ह्या कर्मांबरोबरच ब्राह्मणाने दान, परिग्रह, यजन, याजन, अध्ययन आणि अध्यापन ही सहा कर्मे करावीत. त्यांतील परिग्रह, याजन आणि अध्यापन ही उपजीविकेसाठी आहेत; तर इतर अधिक पुण्यसंचयासाठी आहेत.३२. वैदिक आणि तांत्रिक अशा मिश्र विधीने किंवा केवळ वैदिक विधीने गुरूंनी सांगितल्याप्रमाणे कर्म करावे. प्रथम शौचविधि करून मुखमार्जन आणि स्नान करावे. त्यानतंर दोन वेळा आचमन करून(३३) ब्रह्मचाऱ्याने तीन काष्ठे असलेले तर गृहस्थाने पांच काष्ठ्यांचे वस्त्र नेसावे. धुवून चांगली वाळविलेली दोन वस्त्रे धारण करावीत. एक कमरेला आणि एक अंगावर. मग शेंडी बांधून मौन धरावे. गोपीचंदन, भस्म किंवा चंदन धारण करावे. हातांत दर्भ घ्यावेत. पावित्र्याने (सोवळ्याने) कर्म करावे.३४.

**पीठस्थोऽन्तर्जानुकरः प्रकुर्यात्कर्म सत्स्थले । उपोषितो विना नैशं कुर्याद्यज्ञजपार्चनम् ।।३५।।**
**दोषो नौषधगव्येक्ष्वप् फलताम्बूलभक्षणे । कर्म संकल्प्य कार्यं सम्पूर्णतास्येश्वरार्पणात्।।३६।।**
**(क्षेपकः) खेऽर्को यत्रैत्युद्गमास्तौ प्राक्प्रत्यक् ते ततोऽपराः ।।**

सत्+स्थले पीठस्थः अन्तः+जानु+करः कर्म प्रकुर्यात्। यज्ञ+जप+अर्चनं, विना नैशं उपोषितः कुर्यात्।३५। औषध+गव्य+इक्षु+अप्+फल+ताम्बूल+भक्षणे न दोषः। कर्म संकल्प्य कार्यम्। ईश्वर+अर्पणात् अस्य सम्पूर्णता।३६। खे यत्र अर्कः अद्गम+अस्तौ ते प्राक्+प्रत्यक्। ततः अपराः।

पवित्र ठिकाणी आसनावर बसून कर्म करावे; हात गुडघ्याच्या आत असावेत. यज्ञ, जप, पूजा हे उपाशीपोटी करावेत. रात्रीच्या कर्माला हा नियम नाही. औषध, दूध, ऊस (रस), पाणी, फळ, तांबूल ही कर्माच्या आधी घेतली तर दोष नाही. कर्म करताना आधी संकल्प करावा. *यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपः पूजाक्रियादिषु न्यूनं सम्पूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम्।।* या नारदपुराणाच्या वचनानुसार (पूर्वपाद १ः१७ः१०८) आणि *प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषु यत् । स्मरणादेव तद्विष्णोः सम्पूर्णं स्यादिति श्रुतिः।।* या स्मृतीनुसार कर्माची संपूर्णता ते ईश्वराला अर्पण केल्यानेच होते.३५-३६.

आकांशात सूर्य जिथे उगवतो ती पूर्व दिशा आणि जिथे मावळतो ती पश्चिम दिशा. त्यापासून इतर दिशा काढता येतात. ज्या प्रदेशात पूर्व काढायची असेल तिथे एक वर्तुळ काढावे. त्याच्या मध्यभागी बारा अंगुळांचा एक शंकू ठेवावा. दिवसाच्या पूर्वार्धात शंकूची सावली जिकडे पडेल त्या सावलीच्या टोकावर खूण करावी. ही पश्चिम दिशा होय. दुपारच्यानंतर शंकूची सावली जिथून वर्तुळाच्या बाहेर पडेल ती पूर्व दिशा. आता ह्या दोन्हीच्या मधोमध जो व्यास आहे त्याच्या टोकांना दक्षिण आणि उत्तर दिशा. चार दिशांच्या मध्यबिंदूवरून विदिशा (आग्नेयादि) काढता येतात. हे दिक्साधन ज्या दिवशी सायनांश सूर्य मेष राशीला येतो त्या दिवशी करावे. इतर दिवशी सूर्यक्रांतीनुसार दिशासाधनेचे वेगळे गणित करावे लागेल.

**द्युनक्तं प्रागुदग्वक्त्रो होमाद्येऽग्न्यादिसंमुखः । सौम्यैन्द्र्यैशान्यनुक्तायां दक्षाङ्गं चोपवीतता ।।३७।।**

द्यु+नक्तं प्राक्+उदक्+वक्त्रः। होमाद्ये अग्नि+संमुखः। अनुक्तायां सौम्य+ऐन्द्र+ऐशानि दक्षाङ्गं च उपवीतता।३७।

अशा रीतीने सूर्योदयावरून दिशा निश्चित होतात. सूर्योदय याचा अर्थ सूर्य त्या त्या लोकांतील जीवांना दृग्गोचर होतो तो आणि अस्त म्हणजे सूर्य दृष्टिआड होणे. ज्या लोकात कुणी प्राणीच निवास करीत नाहीत तिथे सूर्य त्या मार्गाने जाऊनही त्याचा उदय होत नाही आणि अस्तही होत नाही. मग अमरकोशांत सांगितल्याप्रमाणे एका महिन्यांत पितरांचे एक अहोरात्र होते, वर्षांत देवांचे अहोरात्र, देवांच्या हजार युगांचे ब्रह्मदेवाचे दोन अहोरात्र इत्यादि कालगणनेचा कसा संदर्भ लावायचा? जसा या भारतवर्षांत साठ घटकांचा (चोवीस तासांचा) अहोरात्र आहे, त्या मानवी मापाने एक महिन्यांत पितरांचा अहोरात्र होतो. अर्थात मानवी शुक्लपक्षात पितृलोकांत सतत सूर्यदर्शन होते आणि कृष्णपक्षात रात्र असते. त्याच प्रकारे स्वर्गातील देवांचा अहोरात्र मानवी वर्षाएवढा असतो. तिथे मानवी उत्तरायणात सतत सूर्य दिसतो व दक्षिणायनात त्याचा अस्त असतो. जेव्हा अमरावतीला सूर्य माध्याह्नाला येतो तेव्हा दक्षिणेला असलेल्या संयमिनीत (यमपुरी) तो उत्तरेकडे उगवताना दिसतो. जेव्हा संयमिनीत सूर्य माथ्यावर येतो तेव्हा वारुणीत तो उगवताना दिसतो. इलावृत चारी बाजूंनी पर्वतांनी वेढलेले असल्याने तिथे सूर्याचा प्रकाश पर्वतावरील छिद्रांतून प्रवेश करीत असल्याने ऊर्ध्व दिशेला उगवतो आणि खाली मावळतो. छांदोग्यात सांगितल्याप्रमाणे (३:११:२) ब्रह्मलोकात सूर्य सततच प्रकाशत असल्याने उदयास्त नाहीत.

दिवसा पूर्वाभिमुख आणि रात्री उत्तराभिमुख बसून कर्म करावे. होमासाठी अग्नीसंमुख (आश्वलायन गृह्यसूत्र १:१०:१५-१६) आणि पूजेसाठी देवसंमुख बसावे. ज्या कर्मात दिशा सांगितली नसेल तिथे पूर्व, उत्तर किंवा ईशान्येकडे मुख करावे. स्थलाचा निर्देश नसेल तर उजव्या अंगाने बसावे. जानवे उपवीतीला (डाव्या खांद्यावर) असावे.३७.

**आसीनत्वं मध्यपाठो देवतीर्थमनुक्तके । निवीतं कण्ठलम्ब्यार्षं दक्षांसस्थं तु पित्र्यकम् ।।३८।।**
**प्राचीनावीतमन्यांसस्थं सूत्रं तूपवीतकम् । भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा दद्ध्यान्नवं विधेः ।।३९।।**
**त्रिघ्नीकृत्य त्रिपद्या षण्नवतिस्वकरोन्मितम् । तूलादिसूत्रं पुनस्त्रिरावृत्य नवसूत्रकम् ।।४०।।**
**कृत्वा त्रिरावृतं ग्रन्थिं दत्वा काजशिवान्नमन् । प्रोक्ष्याब्लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या धेहि मन्त्रवत् ।।४१।।**

अनुक्तके आसीनत्वं, मध्यपाठः, देवतीर्थं। कंठलंबी+आर्षं निवीतं ऋषि+कर्मणि। पित्र्यकं तु दक्ष+अंसस्थम्।३८। अन्य+अंसस्थं तु उपवीतकम्। भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा विधेः नवं दध्यात्।३९। षण्+नवति+स्वकर+उन्मितं तूलादि+सूत्रं त्रिपद्या त्रिघ्नी+कृत्य पुनः त्रिः आवृत्य नव+सूत्रकं कृत्वा त्रिः+आवृतं क+अज+शिवान् नमन् ग्रन्थिं दत्वा अप्+लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या प्रोक्ष्य मन्त्रवत् धेहि।४०-४१।

स्थिति सांगितली नसेल तर बसून कर्म करावे. पाठ सांगितला नसेल तर मध्यमपाठ असावा. तीर्थ सांगितले नसेल तर देवतीर्थ घ्यावे. जानवे गळ्यात सरळ घातले तर ती निवीती होते; ती ऋषिकर्मांत विहित आहे. पितृकर्मांत जानवे उजव्या खांद्यावर (प्राचीनावीती) असावे.३८. जानवे डाव्या खांद्यावर असल्यास त्याला उपवीती म्हणतात. तसे देवकार्यांत ठेवावे. अस्पृश्य, अंत्यज किंवा अस्पृश्य स्त्री यांना शिवल्यास जानवे भ्रष्ट होते; तसे झाल्यास किंवा तुटल्यास ते जानवे टाकून विधिपूर्वक नवीन धारण करावे.३९. आपल्या हाताने शहाण्णव हात सूत किंवा रेशीमादीचा दोरा त्रिपदी गायत्रीने तिहेरी करावा. तो पुनः तिहेरी करून झालेले नवपदरी सूत्र पुनः तिहेरी करून ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांना नमस्कार करीत त्याला गाठ बांधावी. त्या जानव्याचे *'आपोहिष्ठा'*दि तीन ऋचांनी आणि दहा गायत्रींनी प्रोक्षण करावे. मग *'यज्ञोपवीतं'* इत्यादि मंत्राने ते धारण करावे.४०-४१.

**शश्वद्योज्याः सत्स्थिताग्नि-मन्त्रदर्भासनद्विजाः । पिण्डादिस्थाः कुशा विप्रः प्रेतश्राद्धाच्चितानलः ।।४२।।**

**मन्त्रा गौस्तुलसी नीचेऽसन्तः सन् शोधितो द्विजः । सोङ्कारान् सर्वदा होमे स्वाहान्तान्वामहस्तहृत् ।।४३।।**

**आर्षच्छन्दोदेवताविनियोगज्ञो मनून्जपेत् । शूद्राहृतं द्विजक्रीतं समिद्दर्भाप्सुमाद्यसत् ।।४४।।**

सत्+स्थित अग्नि+मंत्र+दर्भ+आसन+द्विजाः शश्वत् योज्याः। पिण्डादिस्थाः कुशाः, प्रेत+श्राद्धात् विप्रः, चिता+अनलः, नीचे, मन्त्राः, गौः, तुलसी असन्तः। द्विजः शोधितः सन्तः। सर्वदा स+ॐकारान्, होमे वाम+हस्त+हृत् स्वाहा+अन्तान्।४२-४३। मनून् आर्ष+छंदः+ देवता+विनोग+ज्ञः जपेत्। शूद्र+आहृतं द्विज+क्रीतं समित्+दर्भ+अप्+सुम+आदि असत्।४४।

शुभकार्यांत वापरलेले सुस्थितीतील अग्नी, मंत्र, दर्भ, आसन आणि ब्राह्मण यांचा वारंवार उपयोग करावा. पिण्डावर वगैरे टाकलेले दर्भ, एकोद्दिष्ट श्राद्ध जेवलेला ब्राह्मण,(४२) चितेचा अग्नी, नीचाकडचा मंत्र, गाय आणि तुळस हे सर्व अशुभ आहेत. ब्राह्मण संस्कार, प्रायश्चित्त इत्यादींनी शुद्ध होतो. जप, होम इत्यादि सर्व कार्यात मंत्राच्या पूर्वी ॐकार लावून उच्चार करावा. होमाच्या वेळी मंत्राच्या शेवटी स्वाहा लावावे आणि डावा हात हृदयावर धरलेला असावा.४३. *'अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च। योऽध्यापयेद्यजेद्वाऽपि पापीयान्जायते तु सः'* या स्मृतीनुसार (बृहद्देवता ८ः१३६) मंत्रांचा जप करतांना ऋषी, छंद, देवता आणि विनियोग यांचे ज्ञान आवश्यक आहे. समिधा, दर्भ, पाणी, फुले इत्यादी ब्राह्मणांनी स्वतः आणावीत असे धर्मसिंधूंत वचन आहे. ती शूद्राने आणलेली किंवा ब्राह्मणाने विकलेली असतील तर अशुद्ध आहेत.४४.

**अफेनानुच्छिष्टहस्त-नखास्पृष्टामलाम्बु सत् । कुशकाशयवोशीर-गोधूमव्रीहिकुन्दराः ।।४५।।**
**दूर्वामौञ्जस्तृणं दर्भा वर्षामास्वीकृताः शुभाः । मूलतो ब्रह्मविष्णवीशा दर्भे सर्वेऽभितोऽमराः ।।४६।।**
**कर्मोत्तरान्तं प्राक्संस्थं व्यस्तं वा पित्र्यमग्निगम् । याम्यन्तं तद्वदास्यं च ज्ञेयोऽङ्गे वामतः क्रमः ।।४७।।**

अफेन+अनुच्छिष्ट+हस्त+नख+अस्पृष्ट+अमल+अम्बु सत्। कुश+काशय+वोशीर+गोधूम+व्रीहि+कुन्दराः दूर्वा+मौञ्जः+तृणं दर्भाः वर्षा+अमा+स्वीकृताः शुभाः। दर्भे मूलतः ब्रह्म+विष्णु+ईशाः अभिते सर्वे अमराः।४५-४६। कर्म उत्तरान्तं प्राक्+संस्थं व्यस्तं वा। पित्र्यं अग्नि+गं याम्यन्तं तत्+वत् आस्यं च। अङ्गे वामतः क्रमः।४७।

पाणी फेसरहित, उष्टे नसलेले, हात किंवा नख न लागलेले आणि स्वच्छ, कर्मासाठी श्रेष्ठ जाणावे. कुश, कास, जव, वाळा,गहू, साळी, कुन्दा, दूर्वा, मुंज आणि गवत हे दहा दर्भ आहेत. ते श्रावणातील अमावास्येला घतलेले शुभ होत. *'अयातयामास्ते दर्भाः विनियोज्याः पुनः पुनः'* या धर्मसिंधूच्या वचनानुसार ते वर्षभर वापरता येतात. दर्भाच्या मुळाशी ब्रह्मा, मध्ये विष्णू, अग्राला शंकर आणि सभोवती सर्व देवता वास करतात.४५-४६. देवकर्म करताना ते पूर्वेकडे स्थापून उत्तरेला संपवावे किंवा उत्तरेकडे स्थापून पूर्वेला संपवावे आणि पितरांचे कर्म आग्नेयेला आरंभ करून दक्षिणेला संपवावे. देवकर्म करतांना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख असावे आणि पितृकर्माचे वेळी दक्षिणेकडे मुख करावे. अंगाविषयी डावीकडून क्रम असावा. ४७.

**तर्जन्यल्पाधःकराग्र-मध्यादिषु यथाक्रमम् । तीर्थं पित्र्यं कायदैवमाग्नेयं ब्राह्ममुच्यते ।।४८।।**
**पित्रर्षिदेवादानोप-स्पर्शकार्यं चरेत्तु तैः । वामान्वारब्धान्यपाणिः कर्माद्यान्ताम्बुदानयुक् ।।४९।।**
**त्वक्फलकृमिरोमोत्थ-श्वेतासृक्पीतमेचकम् । वासो दग्धं द्विजादेः सद्धौतमस्फाटितं स्वकम् ।।५०।।**
**ब्राह्मे मुहूर्त उत्थाय गणेशब्रह्मविष्णवजान् । देवान्नत्वा गुरून्खेटान्गां सच्छ्लोकांश्च संस्मरेत् ।।५१।।**

तर्जनी+अल्प+अधः+कर+अग्र+मध्य+आदिषु यथाक्रमं पित्र्यं कायं आग्नेयं ब्राह्मं तीर्थं उच्यते।४८। पितृ+ऋषि+देव+आदान+उपस्पर्श+कार्यं तैः चरेत्। वामान् वा आरब्ध अन्य पाणिः। कर्म आदि+अंत अम्बु+दान+युक्।४९। त्वक्+फल+कृमि+रोम+उत्थ श्वेत+असृक्+पीत+मेचकं वासः द्विज+आदेः । धौतं अदग्धम् अस्फाटितं स्वकम् सत् ।५०। ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय गणेश+ब्रह्म+विष्णु+अजान् देवान् गुरून् खेटान् गां च नत्वा सत्+श्लोकान् च संस्मरेत्।५१।

उजव्या हाताच्या तर्जनीखाली पितृतीर्थ, करंगळीखाली ऋषितीर्थ, हाताच्या अग्रभागी दैवतीर्थ, मध्यभागी आग्नेय तीर्थ आणि करमूलाजवळ ब्राह्मतीर्थ अशी तीर्थे आहेत. त्यांची योजना अनुक्रमे पितृकर्म, ऋषिकर्म, देवकर्म, प्रतिग्रह (दान घेणे) आणि आचमन यासाठी करावी. कर्माच्या आरंभी डाव्या हाताने उजव्या हाताला स्पर्श करावा. कर्माच्या आरंभी आणि शेवटी पाणी द्यावे.४८-४९. झाडाच्या सालीपासून केलेले पांढरे, कापसाचे लाल, रेशमाचे पिवळे व लोकरीचे निळे (काळे) ही वस्त्रे अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना शुभ आहेत. वस्त्र स्वच्छ धुतलेले, न जळलेले, न फाटलेले आणि आपले स्वतःचे शुभ जाणावे. इथे आचारधर्माची परिभाषा पूर्ण झाली.५०.

ब्राह्म मुहूर्त म्हणजे चिंतनाला योग्य असा रात्रीचा चौथा प्रहर. त्या वेळीं उठून गणेश, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आदि देवांना, तसेच माता, पिता, गुरू इत्यादि वडीलधाऱ्यांना, सूर्यादि ग्रहांना, भूमीला आणि गोमातेला नमस्कार करून धर्मादि पुण्यश्लोकांचे स्मरण करावे.५१.

**ग्रामाद्बहिस्तु नैर्ऋत्यां सदद्व्रम्ब्वध्वादि वर्जिते । स्थलेम्बु दूरात्संस्थाप्य यतनासाक्षिवाक् तृणे ।।५२।।**
**उदङ्मुखोऽन्यथा नक्तमासीनो वस्त्रमस्तकः । आर्षसूत्रं दक्षकर्णे कृत्वा मूत्रविशौ त्यजेत् ।।५३।।**
**लिङ्गं सहाद्भिरप्स्थार्द्र-धात्रीमात्रमृदा गुदम् । त्रिर्वामो दशवारं च करः शोध्याः कराङ्घ्रयः ।।५४।।**
**प्रत्येकं सप्तवारं द्वि-गुणं वीर्येऽर्धमन्यके । वर्णिवानप्रस्थभिक्षोः शौचं द्वित्रिचतुर्गुणम् ।।५५।।**

ग्रामात् बहिः नैर्ऋत्यां सत्+द्रु+अम्बु+अध्व+आदि वर्जिते स्थले, अम्बु दूरात् संस्थाप्य यत+नासा+अक्षि+वाक् उदक्+मुखः नक्तं अन्यथा वस्त्र+मस्तकः आर्षसूत्रं दक्ष+कर्णे कृत्वा मूत्र+विशौ त्यजेत्।५२-५३। अप्+स्थ+आर्द्र+धात्री+मात्र मृदा अद्भिः सह लिङ्गं, गुदं त्रिः, वामः करः दशवारं च शोध्याः। कर+अङ्घ्रयः प्रत्येकं सप्तवारम्। वीर्ये द्विगुणम्। अन्यके अर्धम्। वर्णि+वानप्रस्थ+भिक्षोः द्वि+त्रि+चतुः+गुणं शौचम्।५४-५५।

नंतर गावाच्या बाहेर नैर्ऋत्य दिशेला जाऊन वड, पिंपळ आदि पुण्यवृक्षांपासून, (नदी, तलाव इत्यादि) जलापासून तसेच वाटेपासून दूर जागेवर पाणी दूर ठेवावे; डोक्यावरून नाकावर वस्त्र घेऊन, दृष्टी स्थिर करून, इकडे-तिकडे न पाहता मौन धारण करावे; गवत पसरावे; उत्तरेकडे (रात्री दक्षिणेकडे) तोंड करून, वस्त्र डोईला गुंडाळून, जानवे उजव्या कानाला अडकवून मलमूत्रविसर्जन करावे.५२-५३.

ओल्या आवळ्याएवढ्या ओल्या मातीच्या गोळ्यांनी आणि पाण्याने एक वेळा लिंग, तीन वेळा गुद, दहा वेळा डावा हात, उजवा हात आणि दोन्ही पाय प्रत्येकी सात वेळा स्वच्छ करावेत. वीर्यपातानंतर हेच शौच दुप्पट करावे; मूत्रोत्सर्गानंतर निम्मे करावे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी यांना शौचाचे प्रमाण दुप्पट, तिप्पट आणि चौपट सांगितले आहे.५४-५५.

**अर्धार्धार्धं निशाशक्ति-मार्गेष्वज्ञाबलासु तु । गन्धलेपान्तावधि स्याद् गण्डूषान्वामतस्त्यजेत् ।।५६।।**
**द्विजो द्वादश चान्योऽल्पान्तर्जन्यास्यं न शोधयेत् । क्षीरिकण्टकिवृक्षाम्र-निम्बापामार्गदारुणा ।।५७।।**
**द्वादशाङ्गुलमात्रेण द्विजोऽन्योऽल्पेन मन्त्रवत्। शुद्धास्योऽब्गोविशा प्रातः स्नायान्मध्यन्दिनेऽम्मृदा ।।५८।।**
**भिक्षुर्व्रती त्रिकालं न चिरण्टी शिरसा सदा । शीतैः शीताप्सम्पुटितोष्णकैर्वाब्लिङ्गमन्त्रितैः ।।५९।।**

अर्ध+अर्ध+अर्धं निशा+अशक्ति+मार्गेषु। अज्ञ+अबलासु गन्ध+लेप+अन्त+अवधि स्यात्। द्विजो गण्डूषान् वामतः त्यजेत्, अन्यो अल्पान्। तर्जन्या आस्यं न शोधयेत्। क्षीरि+कण्टकिवृक्ष+आम्र+निम्ब+अपामार्ग+दारुणा द्वादश+अंगुल+मात्रेण द्विजः अन्यः अल्पेन मन्त्रवत् शुद्ध+आस्यः प्रातः अप्+गो+विशा स्नायान्। मध्यन्दिने मृदा।५६-५८। भिक्षुः व्रती त्रिकालं (स्नायात्)। चिरण्टी सदा शिरसा न स्नायात्। शीतैः शीत+अप्+सम्पुष्टित+उष्ण+कैः वा अप्+लिङ्ग+मन्त्रितैः (स्नायात्)।५९।

रात्रीच्या वेळी शौच अर्धे करावे, अशक्तांनी त्याच्या अर्धे आणि प्रवासात त्याच्याही अर्धे करावे. लहान मुले आणि स्त्रिया यांच्यासाठी शौचाची मात्रा केवळ गंध आणि लेप जाईपर्यंतच सांगितली आहे. चुळा डावीकडे टाकाव्यात. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी दहा, वैश्यांनी आठ तर शूद्रांनी चार चुळा भराव्यात. तर्जनीने दात घासू नयेत. पिंपळ, बाभळ, आंबा, निम्ब, आघाडा यांच्या काडीने दात घासावे. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी आठ आणि वैश्यांनी आठ अंगुलीच्या सालीसह ओल्या काष्ठाने '*मुखदुर्गन्धि*' या मंत्राने दात घासून जीभ रगडून इत्यादि प्रकारे तोंड धुवावे. नंतर प्रातःस्नान गोमय आणि पाण्याने करावे. मध्याह्न काळी मृत्तिकास्नान करावे.५६-५८.

कुटीचक आणि बहूदक संन्याशांनी, वानप्रस्थांनी तसेच चांद्रायणादि व्रत करणाऱ्यानी त्रिकाल स्नान करावे. हंस संन्याशांना एकच वेळ स्नान विहित आहे. सुवासिनींनी नेहमी डोक्यावरून स्नान करू नये. थंड पाण्याने किंवा '*आपोहिष्ठा*' इत्यादि मंत्रांनी मंतरलेल्या संपुष्टित गरम पाण्याने स्नान करावे. संपुष्टित म्हणजे आधी थोडे थंड पाणी घालून त्यानंतर कढत पाणी आणि पुनः वरून थंड पाणी मिसळणे.५९.

**धाम्न्याचमनसङ्कल्प-मार्ष्टितृप्त्यघहारि नो । दीपाल्युत्सवमाङ्गल्याऽब्दाद्येऽभ्यङ्गं सदैच्छिकम् ।।६०।।**
**अनिन्द्याहेऽधवाभिक्ष्वोर्नेदं स्नायान्न शीतकैः । माङ्गल्येऽर्भोत्पत्तिपर्व-क्रान्तिश्राद्धेषु नोष्णकैः ।।६१।।**
**स्नायाद्वान्त्यशुचिस्पर्श-दुःस्वप्नरतिदुर्गमे । नद्यां प्रवाहाभिमुखो वरुणं प्रार्थ्य मन्त्रवत् ।।६२।।**
**स्नात्वा लोड्याम्ब्वम्बुमन्त्रैः स्वमुन्मार्ज्याघमर्षणम् । कृत्वा स्नात्वा तर्पयित्वा जले देवानृषीन्पितॄन् ।।६३।।**
**निष्पीड्योदग्दशं वासः शोधिताङ्गो गृहं व्रजेत् । स्रवत्यात्मा सरन्ध्रोऽतः प्रातःस्नानं विशोधनम् ।।६४।।**

धाम्नि आचमन+आचमन+सङ्कल्प+मार्ष्टि+तृप्ति+अघहारि नो। दीपालि+उत्सवे+माङ्गल्ये+अब्दाद्ये अभ्यङ्गं (कार्यम्)। सदा अनिन्द्य+अहे ऐच्छिकम्। अधवा+भिक्षोः इदं न। माङ्गल्ये शीत+कैः न स्नायात्। अर्भ+उत्पत्ति+पर्व+क्रान्ति+श्राद्धेषु उष्ण+कैः न।६०-६१। वान्ति+अशुचि+स्पर्श+दुःस्वप्न+रति+दुर्गमे स्नायात्। नद्यां प्रवाह+अभिमुखः मन्त्रवत् वरुणं प्रार्थ्य स्नात्वा अम्बु आलोड्य अम्बु+मन्त्रैः स्वं उन्मार्ज्य, अघमर्षणं कृत्वा, जले स्नात्वा देवान् ऋषीन् पितन् तर्पयित्वा, वासः उदक्+दशं निष्पीड्य, शोधित+अङ्गः गृहं व्रजेत्। सरन्ध्रः आत्मा स्रवति। अतः प्रातः+स्नानं वि+शोधनम्।६२-६४।

घरी स्नान करताना आचमन, संकल्प, मार्जन, तर्पण आणि अघमर्षण करू नये. दिवाळीच्या सणांत, विवाहादि मंगलकार्याच्या दिवशी, पाडव्याला अभ्यंग स्नान करावे. इतर दिवशी, षष्ठी, अष्टमी आणि चतुर्दशी सोडून ते ऐच्छिक आहे. विधवा आणि संन्यासी यांना अभ्यंगस्नान वर्ज्य आहे. मंगलकार्यादिवशी थंड पाण्याने स्नान करू नये. पुत्रजन्म, पर्वकाल, संक्रान्ती आणि श्राद्ध या दिवशी गरम पाण्याने स्नान करू नये.६०-६१. उलटी झाल्यावर, अपवित्र व्यक्तीचा स्पर्श झाल्यावर, दुःस्वप्नानंतर, मैथुनोत्तर, स्मशानादि स्थानी गेल्यावर स्नान करावे. नदीत स्नान करताना प्रवाहाकडे तोंड करून वरुणाची प्रार्थना करून *'हिरण्यशृंग'* इत्यादि मंत्रांनी स्नान करावे. पाणी लोटून *'आपोहिष्ठा'*दि मंत्रांनी स्वतःवर मार्जन करावे. मग अघमर्षण करून स्नान करावे आणि पाण्यातच देव, ऋषी आणि पितर यांचे तर्पण करावे. मग वस्त्राच्या दशा उत्तरेकडे करून ते पिळावे. त्या वस्त्राने अंग कोरडे करून घरी यावे. हा देह नऊ रंध्रांतून स्रवत असतो. त्यासाठी प्रातःस्नान हे विशेष शोधन आहे.६२-६४.

**त्रिसप्तद्वादशाहं चेत् सन्ध्यास्नानाग्निवर्जितः । द्विजोऽपि शूद्रोऽशक्तश्चेन् मान्त्राद्यन्यतमं चरेत् ।।६५।।**
**हृद्यभौमाग्नेयमान्त्रानिलदिव्यैः शुचिर्हरेः । ध्यानमृद्भस्माम्मनुगो-रजोवर्षात्मकाप्लवैः ।।६६।।**
**मेधाऽलोलुपतारोग्य-रूपतेजोयशोबलम् । शौर्यदुःस्वप्नहृत्यायुर्लभेत्स्नातोऽन्यथापरम् ।।६७।।**
**स्नात्वा मृद्भस्म हुत्वाङ्गे धार्यमभ्यर्च्य चन्दनम् । केशवाद्यैर्द्वादशभिः सिते पक्षेऽसिते परैः ।।६८।।**

त्रि+सप्त+द्वादश+अहं सन्ध्या+स्नान+अग्नि+वर्जितः चेत् द्विजः अपि शूद्रः (भवेत्)। अशक्तः चेत् मान्त्रादि अन्यतमं चरेत्।६५। हृद्य+भौम+आग्नेय+मान्त्र+अनिल+दिव्यैः हरेः ध्यानं+मृत्+भस्म+ अप्+मनु+गोरजः+वर्षात्मक +आप्लवैः शुचिः।६६। स्नातः मेधा, अलोलुपता, आरोग्य, रूप, तेजः, यशः, बलं, शौर्य, दुःस्वप्न+हृति, आयुः लभेत्। अन्यथा अपरम्।६७। स्नात्वा मृत्, हुत्वा भस्म, अभ्यर्च्य चन्दनं अङ्गे धार्यम्। सिते पक्षे केशवाद्यैः द्वादशभिः, असिते परैः।६८।

तीन दिवस संध्या, सात दिवस स्नान आणि बारा दिवस आधान अग्नी टाकल्यास ब्राह्मणसुद्धा शूद्र होतो. स्नान करण्याची शक्ती नसेल तर मंत्रस्नानादि एखादा पर्याय अवलंबावा.६५. हे पर्याय असे - हरीच्या ध्यानाने **मानसिक**, द्वारावती वा अन्य मृत्तिकेच्या लेपाने **पार्थिव** स्नान, भस्मलेपनाने **आग्नेय** स्नान, '*आपोहिष्ठा*'दि मंत्रांनी मंत्रस्नान, गोधूलीयुक्त वारा अंगावर घेतल्याने वायुस्नान आणि ऊन्हात पडणाऱ्या पावसात भिजणे हे **दिव्य** स्नान, यांनी शुद्धता येते.६६. स्नान केल्याने, बुद्धीची धारणाशक्ती, अलोलुपता, आरोग्य, सुरूपता, कांती, कीर्ती, बळ, दुःस्वप्ननाश आणि दीर्घायुष्य लाभते. स्नान न करणाऱ्याला याच्या उलट फळे - बुद्धिमांद्य, लंपटपणा, रोग, कुरूपता, निस्तेज कांती, अपकीर्ती, बलहीनता, दुःस्वप्न आणि अल्पायुष्य मिळते.६७. स्नानानंतर मृत्तिका (गोपीचंदन), होमानंतर भस्म आणि पूजेनंतर चंदन लावावे. शुक्ल पक्षात केशव, नारायण इत्यादि बारा नावांनी व कृष्ण पक्षात संकर्षण, वासुदेव इत्यादि पुढच्या बारा नावांनी गोपीचंदनादि धारण करावे.६८.

**ललाटोदरहृत्कण्ठ-दक्षकुक्षिभुजश्रुतिः । कुक्षिदोः श्रुतिपृष्ठाङ्ग-ककुन्मूलेन कं त्विति ।।६९।।**
**मृद्गन्धितिलकैरङ्क्या भस्मपुण्ड्रैः षडर्णतः । मृताशौचे न गन्धात्र माङ्गल्ये भस्म धारयेत् ।।७०।।**
**गयाश्राद्धाधानपट्ट-प्रेतकृत्योत्तरीयकम् । पादुका रौप्यमुद्रा न क्षौरं जीवत्पिता भजेत् ।।७१।।**
**रौप्यहैमीखड्गमुद्रा-वत्तर्जन्यल्पकाङ्गुलिः । साग्रागर्भचतुर्दर्भ-पवित्रानामिकोऽपि वा ।।७२।।**

ललाट, उदर, हृत्, कण्ठ, दक्ष+कुक्षिः+भुजः+श्रुतिः, कुक्षि+दोः श्रुति, पृष्ठ+अङ्ग, ककुत्+मूलेन कं तु इति मृत्+गन्धि+तिलकैः अंक्या। भस्म पुण्ड्रैः षडर्णतः। मृत+अशौचे गन्धात् न। माङ्गल्ये भस्म न धारयेत्।६९-७०। गयाश्राद्ध, आधान, पट्ट, प्रेतकृत्य, उत्तरीयकं, पादुका, रौप्यमुद्रा, क्षौरं जीवत्+पिता न भजेत्।७१। रौप्य+हैमी+खड्ग+मुद्रावत् तर्जनी+अल्पका+अङ्गुलिः वा स+अग्र+अगर्भ+चतुर्दर्भ+पवित्र+अनामिकः अपि।७२।

कपाळ, पोट, छाती, गळा, उजवी कूस, बाहू आणि कान, डावी कूस, बाहू आणि कान, पाठीवर, पाठीच्या वरच्या भागावर वरील बारा नावांनी लावून *'नमो नारायणाय'* मंत्राने मस्तकावर लावावेत. गोपीचंदन आणि गन्ध यांचे उभे टिळे लावावेत. भस्म तीन बोटांनी '*नमः शिवाय*' मन्त्राने आडवे त्रिपुण्ड्र लावावेत. अशौचात गन्ध लावू नये आणि मंगलकार्यांत भस्म लावू नये.६९-७०.

गयाश्राद्ध, अग्निहोत्र, श्रौतकर्म इत्यादि, योगपट्ट (संन्यासकर्मांतील), उत्तरक्रिया, उत्तरीय वस्त्र, खडावा, चांदीची अंगठी आणि क्षौर ही पिता जिवंत असेल तर वर्ज्य आहेत.७१. तर्जनीत चांदीची, अनामिकेत सोन्याची आणि करंगळीत पोलादाची अशा अंगठ्या धारण कराव्यात; किंवा टोकासह गर्भरहित चार दर्भाची दोन पवित्रे दोन्ही अनामिकांत घालावी.७२.

**मुक्ताङ्गुष्ठाल्पगोकर्णाकृतिहस्तेन कं त्रिभिः । केशवाद्यैः प्राश्य हस्तौ द्वाभ्यां प्रक्षाल्य चाधरौ ।।७३।।**
**द्वाभ्यां प्रोक्ष्यास्यमेकैकात् करं पादौ शिरोऽपरैः । आस्यं नासेक्षिणी कर्णौ नाभिं हृत्के भुजौ स्पृशेत् ।।७४।।**
**नासां साङ्गुष्ठतर्जन्याङ्गुष्ठेनास्यं च दृक्श्रुती । सानामिकेन साल्पेन नाभिं करतलाग्रतः ।।७५।।**
**हृद्वाहून्कं च सर्वाभिः स्पृशेदाचमनं त्विदम् । त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः स्पृशेत्कर्णमसंभवे ।।७६।।**

मुक्त+अङ्गुष्ठ+अल्प+गोकर्ण+आकृति+हस्तेन केशव+आद्यैः कं प्राश्य, द्वाभ्यां हस्तौ प्रक्षाल्य च द्वाभ्यां अधरौ प्रक्षाल्य, एक+एकात् आस्यं, (वाम)करं, अपरैः पादौ, शिरः, आस्यं, नासा, अक्षिणी, कर्णौ, नाभिं, हृत्, के, भुजौ स्पृशेत्।७३-७४। स+अङ्गुष्ठ+तर्जन्या नासां, अङ्गुष्ठेन आस्यं च, स+अनामिकेन स+अल्पेन दृक्+श्रुती, करतल+अग्रतः नाभिं हृत्, बाहुं च कं सर्वाभिः स्पृशेत्। इदं तु आचमनम्। असंभवे त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः कर्णं स्पृशेत्।७५-७६।

अंगठा आणि करंगळी मोकळी सोडून मधली तीन बोटे एकत्र धरून तळहात गाईच्या कानाप्रमाणे सखल करावा. त्यात पळीभर पाणी घेऊन (उडदाचा दाणा बुडेल इतके. आचमनाच्या वेळी उणे अधिक जलपान हे सुरापानासमान मानले आहे.) ते देवतीर्थाने (मनगटावरून) *'केशवाय स्वाहा'*, *'नारायणाय स्वाहा'* आणि *'माधवाय स्वाहा'* ह्या नामांनी तीन वेळा प्यावे. मग *'गोविंदाय नमः'* या नामाने उजवा व *'विष्णवे नमः'* या नामाने डावा हात धुवावा. मग *'मधुसूदनाय नमः'* व *'त्रिविक्रमाय नमः'* ह्या दोन नामांनी ओठांना पाणी लावावे. *'श्रीधराय नमः'* या नामाने पुन्हा हात धुवावा. *'हृषीकेशाय नमः'* आणि *'पद्मनाभाय नमः'* ह्या नावांनी पायांना, *'दामोदराय नमः'* नावाने डोक्याला, *'संकर्षणाय नमः'* म्हणत मुखाला, *'वासुदेवाय नमः'* व *'प्रद्युम्नाय नमः'* या नावांनी नाकपुड्यांना, *'अनिरुद्धाय नमः'* व *'पुरुषोत्तमाय नमः'* यांनी डोळ्यांना, *'अधोक्षजाय नमः'* व *'नरसिंहाय नमः'* यांनी कानांना, *'अच्युताय नमः'* याने बेंबीला, *'जनार्दनाय नमः'* या नावाने हृदयाला, *'उपेन्द्राय नमः'* म्हणून डोक्याला, *'हरये नमः'* आणि *'श्रीकृष्णाय नमः'* या नावांनी बाहूंना स्पर्श करावा. त्यानंतर अंगठा व तर्जनी यांनी नाकाला, अंगठ्याने मुखाला, अंगठा व अनामिकेनी डोळ्यांना, अंगठा व करंगळी यांनी कानांना, हाताच्या तळव्याने नाभीला, हाताच्या टोकाने हृदयाला आणि बाहूंना तसेच सर्व बोटांनी मस्तकाला स्पर्श करावा. म्हणजे आचमन पूर्ण होते. एवढे सगळे शक्य नसेल तर वरीलप्रमाणे तीन वेळा पाणी पिऊन हात धुतल्यावर कानाला स्पर्श करावा.७३-७६.

**माषमज्जनमात्राम्बु-पानेऽथ द्विरुपस्पृशेत् । मूत्राद्युत्सर्गशुद्ध्यूर्ध्वं स्नाने दाने सुरार्चने ।।७७।।**
**प्राक्परे कर्मसन्ध्यासु सुप्ते वासोधृतौ क्षुते । कासश्वासागमादानाध्ययनाशुद्धभाषणे ।।७८।।**
**श्मशानचत्वारगतौ पच्छौचे स्वाऽन्ययोः कृते । आचामेद्धीनसंभाषे स्त्रीशूद्रोच्छिष्टभाषणे ।।७९।।**
**रक्ताश्रुपातेऽसुयामे जलोत्तारेऽभिवादने । उच्छिष्टस्पर्शेऽपाने च याते कर्णं स्पृशेत्तु वा ।।८०।।**
**विप्रदक्षश्रुतौ देव-पाशीनेन्द्वग्न्यबाशुगाः । सन्ध्याज्ञानाद्भवेच्छूद्रः सन्ध्याहीनोऽशुचिर्द्विजः ।।८१।।**

पाने माष+मज्जन+मात्र अम्बु द्विः उपस्पृशेत्। मूत्र+आदि+उत्सर्ग+शुद्धि+ऊर्ध्वं; स्नाने, दाने, सुर+अर्चने, कर्म+सन्ध्यासु प्राक्, परे। सुप्ते, वास+उधृतौ, क्षुते, कास+श्वास+आगम+आदान+अध्ययन+अशुद्ध+भाषणे, श्मशान+चत्वार+गतौ, स्व+अन्ययोः कृते पत्+शौचे, हीन+संभाषे, स्त्री+शूद्र+उच्छिष्ट+भाषणे आचमेत्। रक्त+अश्रु+पाते, असुयामे, जल+उत्तारे, अभिवादने, उच्छिष्ट+स्पर्शे, अपाने याते च (आचमेत्) वा कर्णं तु स्पृशेत्।७७-८०। विप्र+दक्ष+श्रुतौ देवाः पाशी+इन+इन्दु+अग्नि+अप्+आशुगाः। द्विजः सन्ध्या+अज्ञानात् शूद्रः भवेत्। सन्ध्याहीनः अशुचिः।८१।

आचमनाच्या वेळी एक उडीद बुडेल इतकेच पाणी प्यावे. आचमन नेहमी दोन वेळा करावे. मूत्रादि उत्सर्गाच्या शुद्धीनंतर द्विराचमन करावे. स्नान, देवपूजा, देव-पितरादि कर्म आणि संध्या यांच्या पूर्वी आणि नंतर द्विराचमन करावे. झोपून उठल्यावर, वस्त्र नेसल्यावर, शिंक आल्यावर, खोकला किंवा दम लागल्यावर, अध्ययनानंतर, अशुची व्यक्तीशी भाषण केल्यावर, श्मशान किंवा चौरस्त्यावर गेल्यास, आपण स्वतः किंवा इतरांनी आपले पाय धुतल्यावर, हीनाशी संभाषण केल्यावर, स्त्री, शूद्र किंवा उष्टा (जेवणानंतर न आंचवलेला) यांच्याशी बोलल्यावर दोन वेळा आचमन करावे. रक्त किंवा अश्रू यांचा स्राव झाल्यावर, प्राणायामानंतर, पाण्यातून पोहून आल्यावर, अभिवादन केल्यावर, उष्ट्याचा स्पर्श झाल्यावर किंवा अपान वायू गेल्यावर आचमन करावे. किंवा कर्णस्पर्श तरी करावा.७७-८०. ब्राह्मणाच्या उजव्या कानात वरुण, सूर्य, चंद्र, अग्नी, जल, आणि वायू या देवता वसतात. ज्याला संध्या येत नाही असा ब्राह्मणही शूद्र होतो. संध्या न केलेला ब्राह्मण अपवित्र असतो.८१.

**विना संध्यावन्दनेन नाधिकारोऽन्यकर्मसु । सम्यग्ब्रह्मात्र ध्यायन्ति विप्राः सन्ध्या ततः स्मृता ।।८२।।**
**भाढ्या भहीनार्कयुक्ता तूत्तमा मध्यमाधमा । प्रातःसंध्याऽपरा तद्वत् सार्कार्कोना च भान्विता ।।८३।।**
**त्रिनाड्यधस्तामकृत्वा चतुर्थार्घ्यं प्रदापयेत् । अध्यर्धयामादासायं संध्या मध्याह्निकी स्मृता ।।८४।।**
**धृत्वानामिकाङ्गुष्ठैर् यतिवर्णी च पञ्चभिः । अन्यो नासां शनैर्वायुं सव्ययापूर्य शक्तितः ।।८५।।**
**प्रणवव्याहृतीः सप्त गायत्रीं शिरसा सह । त्रिर्जपन्कुम्भितं मन्दं दक्षनाड्या विरेचयेत् ।।८६।।**

सन्ध्या+वन्दनेन विना अन्य+कर्मसु अधिकारः न। अत्र विप्राः सम्यक् ब्रह्म ध्यायन्ति ततः सन्ध्या स्मृता।८२। प्रातः+सन्ध्या भा+आढ्या उत्तमा, भ+हीना मध्यमा, अर्क+युक्ता तु अधमा। अपरा तद्वत् स+अर्का (उत्तमा), अर्क+ऊना (मध्यमा) च भ+अन्विता (अधमा)।८३। त्रि+नाडी+अधः तां अकृत्वा चतुर्थ अर्घ्यं प्रदापयेत्। अधि+अर्ध+यामात् आसायं मध्याह्निकी संध्या स्मृता।८४। यति+वर्णी अल्पा+अनामिका+अङ्गुष्ठैः, अन्यो पञ्चभिः नासां धृत्वा सव्यया शनैः आपूर्य प्रणव सप्त व्याहृतीः गायत्रीं शिरसा सह कुम्भितः त्रिः जपन् मन्दं दक्ष+नाड्या विरेचयेत्।८५-८६।

संध्यावन्दन केल्याशिवाय इतर कर्मांचा अधिकार प्राप्त होत नाही. ब्राह्मण ब्रह्माचे सम्यक् (**सं**) ध्यान (**ध्या**) करतात म्हणून तिला संध्या म्हणतात.८२. आकाशात नक्षत्रे दिसत असतानाच केलेली प्रातःसंध्या उत्तम, नक्षत्रे मावळली असता केलेली मध्यम आणि सूर्योदयानंतर केलेली कनिष्ठ जाणावी. त्याचप्रमाणे सायंसंध्या सूर्य मावळायच्या आधी उत्तम, तो मावळल्यावर मध्यम आणि तारे उगवल्यावर कनिष्ठ जाणावी.८३. संध्येला तीन घटकांपेक्षा अधिक विलंब झाला तर प्रायश्चितासाठी चौथे अर्घ्य द्यावे. मध्याह्न संध्येचा काळ दीड प्रहर दिवसापासून संध्याकाळपर्यंत सांगितला आहे. प्रातः, संगव, मध्याह्न, पराह्ण आणि सायाह्न असे दिवसाचे पाच मुख्य भाग आहेत.८४. संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी करंगळी, अनामिका आणि अंगठा यांनी आणि गृहस्थ-वानप्रस्थांनी पाची बोटांनी नाक धरून अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून, डाव्या नाकपुडीने (इडा) हळूहळू पूरक करावा (श्वास आत घ्यावा). मग हनुवटी छातीला टेकवीत

**कार्योऽन्यथासुयामान्यो मूलबन्धोऽत्र सत्तमः । जालन्धरोड्डियाणाख्यौ कुम्भके रेचके हितौ ।।८७।।**

अन्यः असुयामः अन्यथा कार्यः। अत्र मूलबन्धः सत्तमः। जालन्धर+उड्डियाण+आख्यौ कुम्भके रेचके हितौ।८७।

कुंभक करून कार, सात व्याहृति गायत्री आणि शिरस यांचा तीन वेळा जप करावा आणि मग उजव्या नाकपुडीने श्वास उड्ड्याणबंध करून (पोट आत ओढून) हळूहळू सोडावा (रेचक). पूरकाच्या दुप्पट रेचकाचा काळ सांगितला आहे. अधिक वेगाने रेचक केल्यास बलहानी होऊ शकते.८५-८६.

दुसरा प्राणायाम करायचा असेल तर उलटा करावा. म्हणजे उजव्या नाकपुडीने (पिंगलेने) पूरक करून इडेने रेचक करावा. (हठयोगप्रदीपिका २:१०). कुम्भक करताना जालन्धर बंध चांगला तर रेचक करताना उड्डियाण बंध चांगला. हठयोगप्रदीपिकेत (३:७१) सांगितल्याप्रमाणे शिरांतील जालाचे बंधन करून अधोगामी नभोजल अडवतो तो जालंधर बंध. योगतारावलीत भ.पू.पा. शंकराचार्यांनी ह्या तीनही बंधांचे वर्णन असे केले आहे. गळा, पोट आणि गुदद्वार या तीन ठिकाणी जालंधर, उड्डियाण आणि मूल ह्या बंधत्रयांची ओळख पटली तर कालपाशाचा बंध कसा पडेल? उड्डियाण, जालंधर आणि मूल या बंधांनी जागलेली सर्पिणी पश्चिममुखांत प्रविष्ट झाली की वायूचे येणे-जाणे थांबते. (*जालंधरोणड्उानमूलबन्धान् जल्पन्ति कण्ठोदरपायुमूले। बन्धत्रयेऽस्मिन्परिचीयमाने बन्धः कुतो दारुणकालपाशैः।।१।। उड्याणजालन्धरमूलबन्धैरुन्निद्रितायामुरगाङ्गनायां। प्रत्यङ्मुखत्वात्प्रविशन्सुषुम्णां गमागमौ मुञ्चति गन्धवाहः।।२।।*)

अशा प्राणाचा निरोध केल्यावर प्रथम *ॐकार आणि भूः* इत्यादि व्याहृतींचा उच्चार करताना त्यांच्या भूः म्हणजे सर्व पदार्थांनी युक्त असा हा भूलोक आणि *ॐ* म्हणजे ब्रह्म असा विवेक आहे. *भूः*, *भुवः*, स्वः इत्यादि लोकांना ब्रह्मदृष्टीने पाहायचे आहे. ब्रह्म हे सर्वांत श्रेष्ठ असून भूर्भुवः इत्यादींना त्या पातळीला नेऊन ध्यान करावे (*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्*) असे ब्रह्मसूत्र (४:१:५) आहे.

**प्राणायामोऽघनिघ्नोऽयं कार्यः सर्वेषु कर्मसु । ग्रामाद्बहिः स्याद्द्विगुणं नद्यां शतगुणं फलम् ।।८८।।**
**तीर्थे सहस्रं सन्ध्यायामनन्तं सान्ध्यकर्मजम् । बहिःसंध्या सुरापानानृतोक्त्याद्यघहारिणी ।।८९।।**
**संध्यामुपासिष्य इति संकल्प्यादाय मार्जयेत् । गोकर्णाकृतिताम्रादि-पात्रे वामकरेऽप्यपः ।।९०।।**
**वरान्तैर्नान्तैः सथान्तैः क्रमात्के पादयोर्हृदि । आपोहिष्ठेति पच्छोपः प्रातर्मध्यन्दिने निशि ।।९१।।**
**सूर्यश्चापः पुनन्त्वग्निश्चेति प्राश्य ह्युपस्पृशेत् । सोङ्कारव्याहृत्योङ्कारयुग्देव्यप्सूक्ततो द्विजः ।।९२।।**

अयं अघ+निघ्नः प्राणायामः सर्वेषु कर्मसु कार्यः। ग्रामात् बहिः द्विगुणं फलं, नद्यां शतगुणं, तीर्थे सहस्रम् गङ्गायां अनन्तं सान्ध्य+कर्म+जं फलं स्यात्। बहिः+सन्ध्या सुरा+पान+अनृत+उक्ति+आदि+अघ+हारिणी।८८-८९। संध्यां उपासिष्य इति सङ्कल्प्य गोकर्णाकृति ताम्रादि पात्रे, वामकरे वा अपः आदाय मार्जयेत्।९०। आपोहिष्ठा इति पत्+शः क्रमात् वः+अन्तैः के, न+अन्तैः पादयोः 'स'+'थ'+अन्तैः हृदि अपः मार्जयेत्।९१। प्रातः 'सूर्यश्च' मध्यन्दिने 'आपः पुनन्तु' निशि 'अग्निश्च' इति आपः प्राश्य हि उपस्पृशेत्।९२।

हा पापनाशक प्राणायाम सर्वच कर्मांत अवश्यमेव करावा. त्यानंतर आचमन किंवा श्रोतृस्पर्श करावा. संध्येचे फळ गावापेक्षा गावाबाहेर - जलाशयादि स्थानी दुप्पट, तर नदीकाठी शतपट मिळते.८८. संध्याकर्माचे फल तीर्थस्थानी हजारपट तर गंगेत अनंतपट सांगितले आहे. बाहेर केलेल्या संध्येने सुरापान, असत्य भाषण इत्यादि पापांचा परिहार करते.८९. '*संध्यां उपासिष्ये*' असा संकल्प करून, गाईच्या कानाच्या आकाराच्या तांबे, चांदी इत्यादीच्या पात्रात किंवा डाव्या हातात पाणी घेऊन मार्जन करावे.९०. सकाळ, दुपार आणि सायंकाळी आपोहिष्ठादि तीन ऋचांच्या पादांनी पादाचे अंतिम अक्षर '*वः*' असेल तर डोक्यावर, '*न*' असेल पायांवर आणि '*स*' किंवा '*थ*' असेल छातीवर क्रमशः पाणी शिंपडून मार्जन करावे. मग प्रातःसंध्येत '*सूर्यश्च*', माध्याह्न संध्येत '*आपः पुनन्तु*' आणि सायंसंध्येत '*अग्निश्च*' या मंत्रांनी पाणी पिऊन आचमन करावे. या मंत्राचमनानंतर ॐकारासहित सात व्याहृती आणि ॐकारसहित गायत्री तसेच आपोहिष्ठादि नऊ ऋचांनी मस्तकावर मार्जन करावे.९१-९२.

**मार्जयेत्प्रतिमंत्रं के ऋतं चेति तृचान्तरे । निःश्वास्याघनरं स्मृत्वा दक्षनासापुटेन तं ।।९३।।**
**बहिर्निःसार्य हस्तेऽप्सु पतितं नावलोकितं । क्षिप्त्वा क्षितौ वामभाग आचम्याप्पूरिताञ्जलिः ।।९४।।**
**गोशृङ्गमात्रमुद्धृत्याञ्जलिं व्यङ्गुष्ठतर्जनीम् । तिष्ठन्ध्यायन्संमुखोऽर्कं देव्यार्घ्यं त्रिर्निवेदयेत् ।।९५।।**
**असावादित्यो ब्रह्मेति ध्यात्वासिच्य प्रदक्षिणम् । परीत्याचामेन्मध्याह्ने नतोऽर्घ्ये हंस इत्यृचा ।।९६।।**
**जपेद्गृहाद्बहिर्द्विघ्नं त्रिघ्नं नद्यां शतं फलम् । गोष्ठे वनेऽग्निहोत्रे च हरहर्यग्रतोऽमिति ।।९७।।**

स+कार+व्याहृति+ॐकार+युक्+देवी अप्+सूक्ततः द्विजः प्रतिमंत्रं के मार्जयेत्। 'ऋतं च' इति ऋचा अंतरे निःश्वास्य अघनरं स्मृत्वा तं दक्ष+नासा+पुटेन बहिः निःसार्य हस्ते अप्सु पतितं न अवलोकितं वामभागे क्षितौ क्षिप्त्वा आचम्य अप्+पूरित+अञ्जलिः...।९३-९४। संमुखः तिष्ठन् अर्कं ध्यायन् वि+अङ्गुष्ठ+तर्जनीं अञ्जलिं गो+शंङ्ग+मात्र उद्धृत्य देव्या अर्घ्यं त्रिः निवेदयेत्।९५। 'असावादित्यो ब्रह्म' इति प्रदक्षिणम् परीत्य आसिच्य आचामेत्। मध्याह्ने अर्घ्ये नतः 'हंस' इति ऋचा (अर्घ्यं दद्यात्)।९६। जपे गृहात् बहिः द्विघ्नं, नद्यां त्रिघ्नं, गोष्ठे शतगुणं, वने, अग्निहोत्रे च हर+हरि+अग्रतः अमिति।९७।

**अघमर्षण -** 'ऋतं चेति' या तीन ऋचांनी आपल्या हातातले पाणी हुंगून पापपुरुषाचे स्मरण करावे आणि उजव्या नाकपुडीने त्याचे बाहेर हातांतल्या पाण्यांत निःसारण करावे आणि ते पाणी न पाहता डाव्या बाजूला जमिनीवर टाकावे.९३-९४.

**अर्घ्य -** ओंजळीत पाणी घेऊन सूर्याभिमुख उभे राहून त्याचे ध्यान करीत अंगठा आणि तर्जनी वगळलेल्या ओंजळीने पाणी गाईच्या शिंगाइतकी दूर धरून ओंजळीतील पाणी वर उचलून गायत्रीमंत्राने तीन वेळा अर्घ्य द्यावे.९५.

अर्घ्यदानानंतर *'असावादित्यो ब्रह्म'* या मंत्राने सूर्याचे ध्यान करीत, जो या पुरुषात आहे तोच त्या आदित्यांत आहे या श्रुतीच्या (तैत्तिरीय उपनिषद २:८) साराचे चिंतन करीत, आपल्याभोवती पाणी शिंपडत उजवी प्रदक्षिणा करावी आणि आचमन करावे. माध्याह्न संध्येत *'हंसः शुचिषत्'* या मंत्राने वाकून अर्घ्य द्यावे.९६. घराबाहेर जप केल्यास दुप्पट फळ, नदीवर केल्यास तिप्पट, गोठ्यात शतगुण, वनांत, अग्निहोत्रस्थानी किंवा हरिहरांच्या मूर्तीसमोर अपरिमित फळ लाभते.९७.

**काष्ठासनेऽकीर्त्यकर्णं दौरात्म्यं पल्लवेंऽशुके । दैन्यं रुग्ग्राव्ण्यथाऽऽरोग्यं भसिते कम्बले सुखम् ।।९८।।**
**विदैणेयेजिने द्वैपे मोक्षः प्रज्ञायुषी कुशे । व्याहृत्यास्मिन्सिद्धपद्म-स्वस्तिकाद्यासनात्सुखं ।।९९।।**
**उपविश्य क्षमां प्रार्थ्य भूतान्युत्सार्य भावयेत् । यथाङ्गमात्मन्यात्मानं देव्या तद्रूपमेकधीः ।।१००।।**

काष्ठ+आसने अकीर्ति+अक+ऋणं, पल्लवे दौरात्म्यं, अंशुके दैन्यं, ग्राव्णि रुक्, भसिते आरोग्यं, कम्बले सुखं,।९८। ऐणेये अजिने विद्, द्वैपे मोक्षः, कुश+आसने प्रज्ञा+आयुषी। अस्मिन् सिद्ध+पद्म+स्वस्तिक+आदि आसनात् सुखं व्याहृत्या उपविश्य,।९९। क्षमां प्रार्थ्य, भूतानि उत्सार्य, एक+धीः यथा अङ्गं देव्या आत्मनि आत्मानं तत्+रूपं भावयेत्।१००।

**आसनविचार -** लाकडाच्या आसनावर बसल्यास अपकीर्ती, दुःख आणि ऋण, पानाच्या आसनावर किंवा वस्त्रावर बसल्यास दुःस्वभाव, दगडावर बसल्यास दैन्य आणि रोग अशी फळे आहेत. अर्थात वरील आसनांवर बसू नये. भस्मावर बसल्यास आरोग्य, लोकरीच्या आसनावर सुख, मृगाजिनावर ज्ञान, व्याघ्राजिनावर मोक्ष आणि कुशासनावर बुद्धी आणि आयष्याची वृद्धी अशी फळे आहेत. अर्थात या आसनांवर बसावे. हे झाले ज्याच्यावर बसायचे (*आस्यते अस्मिन इति आसनम्*) त्या आसनाविषयी. आता ज्या पद्धतीने बसायचे (*आस्यते अनेन इति आसनम्*) त्याविषयी सांगतात. सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादींपैकी एका आसनावर सात व्याहृतींचा उच्चार करून विधिपूर्वक सुखाने बसावे. या आसनांचे वर्णन हठयोगप्रदीपिकेत (१:२१,२५,३७) पाहावे.९८-९९.

*'पृथ्वि त्वया'* या मंत्राने भूमीची प्रार्थना करून, *'अपसर्पन्तु ते भूता'* आणि *'अपक्रामन्तु भूतानि'* या मंत्रांनी भूतांना दूर सारून, एकचित्ताने गायत्री आपल्या हृदयादि अंगांत कल्पून आपण तद्रूप आहोत अशी भावना करावी.१००.

**आर्षदैवतछन्दांसि स्मरन्नक्षरपूर्वकान् । न्यासान्कृत्वाऽखिला मुद्राः प्रदर्श्य मनुदेवताम् ।।१०१।।**
**तां बालां बालादित्येति त्रिभिर्ध्यानैस्त्रिकालतः । ध्यात्वा चागच्छ वरद इति तिष्ठन्समाहितः ।।१०२।।**
**प्रागास्यो मन्त्रार्थमनु-सन्दधानो जपेच्छनैः । सोङ्कारव्याहृतिं देवीं छिन्नपादां स्रजांशुके ।।१०३।।**

आर्ष+दैवत+छंदांसि स्मरन् अक्षर+पूर्वकान् न्यासान् कृत्वा, अखिला मुद्रा प्रदर्श्य मंत्रदेवतां (स्मरन्)।१०१। 'तां बालां बालादित्य' इति त्रिभिः ध्यानैः त्रिकालतः च 'आगच्छ वरदे' इति ध्यात्वा समाहितः प्राक्+आस्यः तिष्ठन् मंत्र+अर्थ+अनुसंधानः स+ओंकार+व्याहृतिं छिन्न+पादां देवीं अंशुके स्रजा शनैः जपेत्।१०२-१०३।

गायत्रीमंत्राचे विश्वामित्र ऋषी, सविता देवता आणि गायत्री छंद यांचे स्मरण करून गायत्रीच्या चोवीस अक्षरांनी न्यास करून मंत्रदेवतेला सर्व मुद्रा दाखवाव्यात. देवी या पदाने इथे गायत्री जाणावी. आत्मस्वरूपाचे यथार्थ प्रकाशन तीच करते. तीच ब्रह्मज्ञानाचे उपादान - प्रमुख साधन आहे. कारण तीच सर्व छंदांत प्रधान आहे; ती सोमाचे आहरण करते; इतर छंदांची अक्षरे तिच्यात सामावलेली असल्याने ती सर्व छंदांना व्यापून आहे; ती सर्व सवनांना व्यापून आहे. या कारणांनी मंत्रजपात गायत्रीलाच प्राधान्य आहे. विशेषतः ब्राह्मणांचे सत्त्व गायत्रीच आहे. म्हणूनच सर्वश्रेष्ठ गायत्रीमंत्र सोडून इतर कोणताही श्रेष्ठतर मंत्र नाही. त्यासाठी संन्याशांशिवाय इतर सर्व द्विजातींनी तीनही काळात (प्रातः, मध्याह्न, सायं) गायत्रीचाच जप करावा.१०१.

पुढे त्या गायत्रीचे सकाळी '*तां बालां बालादित्यमंडलस्थां*' हे ब्राह्मी, मध्याह्नाला वैष्णवी आणि सायंकाळी शैवी या तीन ध्यानांपैकी कालानुरूप, '*आगच्छ वरदे देवी*' म्हणत गायत्रीचे ध्यान करावे.१०२. मग चित्त समाहित (एकाग्र) करून पूर्वाभिमुख उभे राहावे. गायत्रीमंत्राच्या अर्थाकडे लक्ष देत, ओंकार आणि व्याहृतींसह गायत्रीचा तीन पाद तोडून सावकाश जप करावा. माळ वस्त्रांत धरलेली असावी.१०३.

**मत्रकारौ मनस्त्राणौ तद्योगान्मन्त्र उच्यते । जन्मविच्छेदपापघ्नौ जपकारौ तु तद्युजा ।।१०४।।**

म+त्र+कारौ मनः+त्राणौ तत् योगात् मन्त्र उच्यते। जन्म+विच्छेद+पापघ्नौ ज+प+कारौ तु तत् युजा।१०४।

**गायत्री मंत्राचा संक्षिप्त अर्थ.**

**तत्** म्हणजे गीतेच्या वचनानुसार (१७:२३) परब्रह्म;

**सवितुः** सविता म्हणजे प्रसविता - जनिता. हे सृष्टी, प्रलय आणि स्थिती यांचे उपलक्षण. या संपूर्ण चराचर जगदाभासाचे अधिष्ठानभूत परब्रह्म;

**वरेण्यं** सूक्ष्म बुद्धीनेच आकळण्याजोगे निरतिशय आत्मस्वरूप;

**भर्गो** सर्व अनर्थांचे मूळ असणाऱ्या अविद्या, काम, कर्म आदि दोषांचे भर्जन करणारे, त्यांना जाळून टाकणारे (स्वरूप);

**देवस्य** द्योतनात्मक - स्वयंप्रकाश आणि सर्वप्रकाशक; गीतेच्या (१५:६) भाषेत जिथे न सूर्य प्रकाशतो, न चंद्र न अग्नी, जिथे पावल्यावर पुन्हा संसारात परतत नाही ते माझे परम धाम आहे. (*न तद्भासयते सूर्यो न शंशाङ्को न पावकः। यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।।*). याच अर्थाचा मंत्र कठ उपनिषदांतही (२:५:१५) आहे.

**धीमही** (आम्ही) चिंतन करतो.

**यः** जो जीवात्म्याहून अभिन्न असा परमात्मा.

**नः** आमच्या

**धियः** बुद्धीच्या वृत्तीना

**प्रचोदयात्** प्रेरणा करो.

**प्रोक्तो जपो हि यज्ञोऽयं सर्वयज्ञेषु तूत्तमः। वाचिकोऽसन्मानसः सन् रहस्यो मध्यमो जपः ॥१०५॥**

सर्व+यज्ञेषु तु अयं जपः हि उत्तमः प्रोक्तः। वाचिकः जपः असन्, मानसः सन् रहस्यः मध्यमः।१०५।

सारांश, सर्वसाक्षी, अखिल द्वैतभ्रमाचे अधिष्ठान, परमानंदस्वरूप, सर्व अनर्थांचा निरास करणारे, स्वप्रकाश, चिद्रूप अशा ब्रह्माचे चिंतन करावे. असे चिंतन केल्याने ब्रह्मावर, दोरीवर जसा सापाचा, तशा झालेल्या आभासाचा किंवा विवर्तरूप अध्यारोपाचा अपवाद - निरास, होऊन जीवात्मा आणि परमात्मा यांचे सामान्याधिकरण (एकरूपतेचा निश्चय) होते. या मंत्राच्या अर्थाचे अनुसंधान जपाच्या वेळी करावे. एकदा सांगून ज्ञान झाले नाही तर त्याची वरचेवर आवृत्ती करावी (*आवृत्तिरसकृदुपदेशात्।*) या न्यायानुसार (ब्र.सूत्र ४:१:१) साक्षात्कार होईपर्यंत वरचेवर जप करीत राहावे.

**म**कार म्हणजे मन आणि **त्र**कार म्हणजे त्राण किंवा राखण. यांच्या संयोगाने **मन्त्र** हा शब्द झाला. मनाचे रक्षण करतो तो मंत्र. **ज** म्हणजे जन्मविच्छेद आणि **प** म्हणजे पापनाश यांच्या संयोगाने **जप** शब्द होतो. जन्ममरणांचा छेद करून पापाचा नाश करतो तो जप असा याचा अर्थ.१०४. सर्व यज्ञांत भगवंतांनी हा जपयज्ञच उत्तम मानला आहे (*यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।* भ.गीता १०:२५). हा यज्ञसुद्धा न केला तर तुलनेने कमी सुखाचा हा मानवलोकही मिळणे अशक्य आहे. मग इतर लोकांचा तर विचारच नको. (*नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम।* भ.गीता ४:३१) मोठ्याने उच्चार करून म्हटलेला जप निकृष्ट होय. जीभ किंवा ओठही न हलता केलेला मानसिक जप उत्तम होय. उच्चार न करता पण जीभेची/ओठांची हालचाल करून केलेला रहस्य (*उपांशु*) जप मध्यम जाणावा.१०५.

**शाखारेखाशङ्खमणि-प्रवालस्फटिकैर्जपे । मुक्तापद्माक्षीस्वर्णाक्षैर् दशोत्तरगुणं फलम् ।।१०६।।**
**प्रोक्षिता स्रक् सती मेरु-लङ्घने स्रक्च्युतौ जपे । तन्द्र्यादौ च जपाच्छुद्धिर् देवीं नासाग्रदृग्जपेत् ।।१०७।।**
**यतिर्जपेत्षडोङ्कारां सहस्रं चाष्टयुक्शतम् । अन्योऽष्टाविंशतिं पङ्क्तिं नार्थार्थं तां जपेद् द्विजः ।।१०८।।**
**मैत्रैः सौरैरुपस्थाय वारुणैश्च क्रमात्सदा । जातवेदसे तच्छंयोस् त्रिर्नमो ब्रह्मणे इति ।।१०९।।**

जपे शाखा+रेखा+शंख+मणि+प्रवाल+स्फटिकैः मुक्ता+पद्माक्षी+ स्वर्ण+अक्षैः दश+उत्तर+गुणं फलम्।१०६। स्रक् प्रोक्षिता सती। जपे मेरु+लङ्घने, स्रक् च्युतौ, तन्द्री+आदौ च जपात् शुद्धिः। देवीं नास+अग्र+दृक् जपेत्।१०७। यतिः षट्+ओंकारां सहस्रं जपेत्। अन्यः अष्ट+युक् शतं, अष्टाविंशतिं, पङ्क्तिं (जपेत्)। द्विजः तां अर्थ+अर्थं न जपेत्।१०८। मैत्रैः सौरैः वारुणैः च क्रमात् उपस्थाय, सदा जातवेदसे, तच्छंयोः त्रिः नमो ब्रह्मणे इति।१०९।

बोटांनी, बोटांच्या पेरांनी किंवा शंख, मणी, प्रवाळ, स्फटिक, मोती, पद्माक्षी, सोन्याचे मणी आणि रुद्राक्ष यांच्या माळांनी जप करावा. हे सर्व एकाहून एक दसपट अधिक फळ देतात. म्हणजे बोटांच्या जपाच्या दसपट पेरांनी जप केल्याचे फळ, त्याच्या दसपट शंखांच्या माळेने केलेल्या जपाचे फळ इत्यादि. माळा १०८ मण्यांच्या असाव्या. स्त्रियांना - विशेषतः सुवासिनींना रुद्राक्ष व तुळशीच्या माळा निषिद्ध आहेत.१०६. माळ प्रोक्षण करून घेतलेली चांगली. जप करताना माळ पडली, मेरुमणी ओलांडला किंवा झोप आली तर दोष सांगितला आहे. त्याची अधिक जपाने (किमान एक माळ) शुद्धी होते. गायत्रीचा जप करताना दृष्टी नासिकेच्या अग्रावर (मुळावर? आज्ञाचक्रावर) ठेवावी.१०७. यति शब्दाने इथे बहूदक आणि कुटीचक संन्यासी अभिप्रेत आहेत. त्यांनी सहा ओंकारयुक्त गायत्री मंत्राचा एक हजार जप करावा. ब्रह्मचारी, गृहस्थ आणि वानप्रस्थ यांनी एकशे आठ जप करावा. अशक्त असेल तर किंवा अडचणीच्या वेळी अठ्ठावीस अथवा दहा जप केला तर चालेल. द्विजांनी पैशासाठी गायत्री जप करू नये.१०८. जपानंतर प्रातःकाली मित्रदेवतात्मक *'मित्रस्य चर्षणी धृतो,'* माध्याह्नी सूर्यदेवतात्मक *'उदुत्यं जातवेदसे'* आणि सायंकाळी वरुणदेवातात्मक *'तत्त्वायामि'* या मंत्रांनी उपस्थान करावे. तिन्ही काळी *'जातवेदसे', 'तच्छयोः'* यांनी उपस्थान करून आणि *'नमो ब्रह्मणे'* या मंत्रांचे तीन वेळा पठण करावे.१०९.

**प्रणम्य दिक्तत्पदेव-विप्रान्सन्ध्यां विसृज्य च । गुरुं निषण्णं प्रागास्यं संमुखोऽत्राभिवादयेत् ॥११०॥**
**कराभ्यां यथावामान्य-कर्णौ स्पृष्ट्वा पदौ गुरोः । व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरोऽङ्घ्र्योर्न्यसेत्तदभिवादनम् ॥१११॥**
**हृद्दृग्वाक्पत्कोरुवक्षः-करैर्देवान्नमेद्वरान् । ज्ञानल्पानपि सद्विप्रान् पाणिभ्यान्नाशुचीन्नमेत् ॥११२॥**
**कर्मस्थाग्न्यादिहस्तान्तद्वत्स्वयं चाल्पकान्करात् । उद्वाहोर्ध्वं चरेत्सायं प्रातरौपासनं स्वयम् ॥११३॥**

दिक्+तत्+प+देव+विप्रान् प्रणम्य, सन्ध्यां विसृज्य च प्राक्+आस्यं गुरुं संमुखः अत्र अभिवादयेत्।११०। कराभ्यां यथा+वाम+अन्य+कर्णौ स्पृष्ट्वा, गुरोः पदौ व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरः अङ्घ्र्योः न्यसेत् तत् अभिवादनम्।१११। हृत्+दृक्+वाक्+पत्+क+उरु+वक्षः+करैः देवान् नमेत्। वरान्, अल्पान् अपि ज्ञान्, सत्+विप्रान् पाणिभ्यां नमेत्।११२। अशुचीन्, कर्मस्थान्, अग्निहस्तान्, तद्वत् स्वयं न (नमेत्)। अल्पकान् करात् (नमेत्)। उद्वाह+ऊर्ध्वं स्वयं सायं प्रातः औपासनं चरेत्।११३।

प्राच्यादि दिशा, त्यांचे इंद्रादि दिक्पाल आणि सर्व ब्राह्मणांना प्रणाम करून '*उत्तमे शिखरे*' मंत्राने संध्येच्या विसर्जनानंतर पूर्वाभिमुख बसलेल्या गुरूंना सामोरे जाऊन किंवा इतर वेळीही अभिवादन करावे.११०.

अभिवादन कसे करावे ते सांगतात. आपल्या डाव्या हाताने डाव्या कानाला आणि उजव्या हाताने उजव्या कानाला स्पर्श करून, उजवा हात डाव्या हातावरून गुरूंच्या उजव्या पायाला लावावा व डावा हात डाव्या पायाला लावावा आणि मग आपले मस्तक त्यांच्या पायांवर ठेवावे.१११. देवांना मन, दृष्टी, वाणी, पाय, शिर, मांड्या आणि हात ही आठ अंगे जमिनीला टेकून साष्टांग नमस्कार करावा. आपल्यापेक्षा मोठे, वयानेही लहान असलेले ज्ञानी, सात्त्विक ब्राह्मण यांना दोन्ही हात जोडून नमस्कार करावा.११२. सूतकी इत्यादि अशुद्धांना, कर्म करीत असणारा, अग्नी किंवा समिधा हातात असलेल्यांना, तसेच स्वतः अशुची, कर्मांत किंवा अग्निधारी असल्यास, नमस्कार करू नये. शूद्रादि हीनांना एका हाताने नमस्कार करावा.११३.

**पत्नी वान्यतराग्रेऽन्यश् चेद्धमन्या प्रबोध्य तम् । प्रादुष्कृताग्निं ध्यात्वालङ्कृत्य संस्कृत्य हौम्यकम् ।।११४।।**
**ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः सूर्याय चाग्नये । सायं तूष्णीं तूभयत्र द्वितीयां जुहुयात्ततः ।।११५।।**
**उपतिष्ठेत्स्वर्चिताग्निः सूर्याग्निमनुभिः क्रमात् । कायाभ्यां तूभयत्रात्र षष्टिधान्यमिताहुतिः ।।११६।।**

पत्नी वा अन्यः चेत् अन्यतर+अग्रे। तं धमन्या प्रबोध्य प्रादुष्कृत+अग्निं ध्यात्वा अलङ्कृत्य, हौम्यकं संस्कृत्य।११४। ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः 'सूर्याय', सायं 'अग्नये', तूष्णीं ('प्रजापतये' इति) द्वितीयां जुहुयात्।११५। सु+अर्चित+अग्निः उपतिष्ठेत् क्रमात् सूर्य+अग्नि+मन्त्रैः उभयत्र कायाभ्यां उपतिष्ठेत्। अत्र षष्टि+धान्य+मिता आहुतिः।११६।

**अग्नीची उपासना -** विवाहानंतर रोज सकाळी व सायंकाळी अग्नीची उपासना करावी. किंवा पत्नीने करावी. आश्वलायन गृह्य सूत्रांत (१:९:१-२) दिल्याप्रमाणे पुत्र, कुमारी, अन्तेवासी किंवा नित्य अनुग्रहीत यांनी केल्यास ते स्वतः किंवा पत्नीच्या समोर करावे. वेळूच्या फुंकणीने अग्नी प्रज्वलित करावा. मुखाने करू नये. प्रज्वलन सूर्योदयाच्या पूर्वी किंवा सूर्यास्ताच्या पूर्वी करावे. यात विलंब झाला तर व्याहृतिहोम करून श्रुत्युक्त प्रायश्चित्त घ्यावे. प्रज्वलित अग्नीचे ध्यान करावे. परिसमूहन आणि परिस्तरण करून अग्नीला अलंकारावे. मग होमद्रव्यावर संस्कार करावा.११४. प्रातःकाळी (सूर्योदयापासून संगवापर्यंत) '*सूर्याय इदं न मम*' या मंत्राने व रात्री (सूर्यास्तापासून दहा घटकापर्यंत) '*अग्नय इदं न मम*' या मंत्राने अग्नीच्या ज्वालांत समिधांची आहुती घालावी. दोन्ही वेळा मंत्र मनातच म्हणावा. नंतर '*प्रजापतय इदं न मम*' या मंत्राने दुसरी आहुती द्यावी.११५.

परिस्तरणाचे विसर्जन करून परिसमूहादिकांनी अग्नीची पूजा करून मग सकाळी सूर्य आणि सायंकाळी अग्नीच्या मंत्रांनी व दोन्ही वेळा प्रजापतीच्या मंत्रांनी, '*हिरण्यगर्भःप्रजापत*' (शुक्ल यजुर्वेद २३:१:१, २३:६५:१) उपस्थान करावे. या स्थानी साठ साळींची आहुती द्यावी. शंभर तांदूळांचा प्रस्थ किंवा चौसष्ट अंशांची आहुती द्यावी. उशीर झाल्यास चौपट तुपाने व्याहृतिहोम करावा. संकटकाळी सम होमाचा किंवा तीन पक्षांनी पक्षहोमाचे पर्याय अवलंबावेत.११६.

**पयोदध्याज्यनीवार-यवव्रीह्यादि हौम्यकम् । गृह्यं परिचरेच्छ्रौताग्नीन्वापि ज्ञाततद्वृषः ।।११७।।**
**नातीयाद्ब्राह्मणो यज्ञान् नित्यमासिकवार्षिकान् । नाहोतीयाद्विना दानं शक्त्या दद्यात् किमप्युत ।।११८।।**
**भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्सर्वदाऽसकृत् । संस्कृते साररे च्छन्ने स्वे गृहे निवसेद्गृहि।।११९।।**
**भूः पूताप्युपलिप्ता चेत् पुनर्लेपेन शुद्ध्यति। तन्नित्यं वास्तूपलिम्पेत् प्रेताद्योऽलिप्तकेऽस्ति हि ।।१२०।।**

पयः+दधि+आज्य+नीवार+यव+व्रीहि आदि हौम्यकम्। गृह्यं परिचरेत्। श्रौत+अग्नीन् वा अपि ज्ञात+तत्+वृषः।११७। ब्राह्मणः नित्य+मासिक+वार्षिकान् यज्ञान् न अतीयात्। विना दानं न आहोतीयात्। शक्त्या किं अपि उत दद्यात्।११८। सर्वदा असकृत् भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्। गृही संस्कृते स+अररे छन्ने गृहे निवसेत्।११९। भूः पूता अपि उपलिप्ता चेत् पुनः+लेपेन शुद्ध्यति। तत् वास्तुं नित्यं उपलिम्पेत्। अलिप्तके प्रेताद्याः अस्ति हि।१२०।

दूध, दही, तूप, देवसाळ, जवसाळ, तादूळ ही हवनीय द्रव्ये आहेत. अशा प्रकारे गृह्य अग्नीची किंवा त्याचे विधिविधान जाणून श्रौत अग्नीची परिचर्या करावी. ईशावास्यातील (११,१२) '*विद्यां चाविद्यां*' या प्रतिपादनानुसार कर्माविषयी ज्ञानाच्या अभावांत अनिष्टाची संभावना असते.११७. ब्राह्मणानी नित्याचे पाच महायज्ञ, तसेच दर्श, आग्रयण इत्यादि मासिक व वार्षिक यज्ञ चुकवू नयेत. तसेच दानाशिवाय होम करू नये. शक्त्यनुसार कांही थोडे तरी द्यावेच.११८.

वर सांगितलेल्या '*यस्य स्मृत्या*'... '*प्रमादं कुर्वतां*' या स्मृतिवचनांप्रमाणे कर्मातील न्यूनता दूर करण्यासाठी वारंवार भगवान विष्णूंचे स्मरण करावे. गृहस्थाने वास्तुशांत्यादींनी संस्कारलेल्या, भिंतीनी व छताने आच्छादलेल्या, कपाटांनी युक्त अशा आपल्या स्वतःच्या घरात राहावे. कपाटांनी रहित, नीट न झाकलेले आणि ज्या घरांत बली आणि भोजन दिले जात नाही त्यांत प्रवेशही करू नये. ते संकटांचे आगर असते. '*अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं। गृहं न प्रविशेद्धीमानापदामाकरो हि सः।।*' (निर्णयसिंधू.)११९. महागरुडपुराणांत (प्रेतखंड, धर्मकांड २:१०) सांगितल्याप्रमाणे भूमी सर्वत्र पवित्रच असली तरी एकदां सारविलेली जमीन पुन्हा सारवल्याने शुद्ध होते. (*सर्वत्र वसुधा पूता यत्र लेपो न विद्यते। यत्र लेपो भवेत्तत्र पुनर्लेपेन शुद्ध्यति।।*'). यासाठी जमीन रोज सारवावी. न सारवलेल्या जमिनीवर भूतप्रेतादिकांचा वावर असतोच.१२०.

**कांस्यांशुकेऽत्र गर्ह्ये गो-विशा नैर्ऋतितो गृहम् । उपलिप्य स्वलङ्कार्यं रङ्गवल्ल्यादिनान्वहम् ।।१२१।।**
**स्थाप्यं गव्यं तिलाश्चर्म मणिश्रीखण्डधेनवः । त्रिसन्ध्येऽर्च्योऽमरः प्रातर्विस्तराच्चन्दनादिना ।।१२२।।**
**मध्याह्ने निशिदीपैर्वा गोवज्जन्मान्यथा द्विज । गुर्वर्काग्न्यम्ब्वष्टधार्चा गोविप्रान्यतमार्चनम् ।।१२३।।**
**कुर्यात्तिष्येऽजसामीप्यं शालिग्रामे तमप्युत । गुर्वाज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्स प्रसीदति ।।१२४।।**
**देवो भक्ततपोयोगादृच्छत्यर्चनगौरवात् । बिम्बाभिरूप्यात्सामीप्यं भक्तिरेवात्र कारणम् ।।१२५।।**

अत्र कांस्य+अंशुके गर्ह्ये। गो+विशा नैर्ऋतितो गृहं उपलिप्य रंग+वल्ल्यादिना अन्वहं सु+अलङ्कार्यम्।१२१। गव्यं तिलाः चर्म मणि+श्रीखंड+धेनवः स्थाप्यम्। त्रिसन्ध्ये अमरः अर्च्यः। प्रातः विस्तरात्।१२२। मध्याह्ने चन्दनादिना, निशि दीपैः वा। (हे) द्विज, अन्यथा जन्म गोवत्। गुरु+अर्क+अग्नि+अम्बु+अष्टधा +अर्चा गो+विप्र+अन्यतम अर्चनम्।१२३। तिष्ये शालिग्रामे अज+सामीप्यम्। तं अपि उत गुरु+आज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्। सः प्रसीदति।१२४। देवः भक्त+तपो+योगात्, अर्चन+गौरवात्, बिम्ब+आभिरूप्यात् सामीप्यं ऋच्छति। अत्र भक्तिः एव कारणम्।१२५।

सारवतांना कांशाचे भांडे किंवा वस्त्र ही निषिद्ध आहेत. गाईच्या शेणाने नैर्ऋत्य कोपऱ्यापासून सुरुवात करून घर सारवावे. नंतर ते रोज रांगोळ्यांनी वगैरे चांगले सजवावे.१२१. **देवपूजा -** घरात दूध-दुभते, तीळ, मृगाजिन, शाळिग्राम, चंदनाचे खोड आणि दुभती गाय ठेवावेत. त्रिकाळ देवपूजा करावी. सकाळी सविस्तर पूजा करावी.१२२. माध्याह्नी चंदनादींनी पंचोपचार पूजा व रात्री आरती करावी. अन्यथा हा जन्म पशुवत् जाणावा. गुरू, सूर्य, गृह्याग्नी, तीर्थादि जल, शास्त्राभिमत देवतांच्या आठ प्रकारच्या मूर्ती (काष्ठ, पाषाण, सुवर्णादि धातु, वालुका, मृत्तिका, चित्र, रत्नमणी, मनोमयी), गाय, वेदज्ञ ब्राह्मण यांपैकी एकाची पूजा करावी.१२३. कलियुगात शाळिग्रामात विष्णूचा वास असतो, त्याचीही पूजा करावी. गुरूंची आज्ञा घेऊन भक्तिभावाने पूजा केल्याने देव प्रसन्न होतो.१२४. भक्ताच्या तपोरूपी योगाने, अर्चनाच्या विपुलतेने आणि प्रतिमेच्या सौंदर्याने देव सामीप्य प्रदान करतो. यांत सर्वातही भक्ती हेच कारण आहे.१२५.

**नाश्रद्धधानोऽधिकारी संशयात्मात्र नास्तिकः । येभ्यो मातेति पुंगन्धं निवार्यादाय चाखिलान् ।।१२६।।**
**संभारानुपविश्याग्रे देवस्याप्पूरितं घटम् । दक्षभागे निधायाब्जं प्रपूज्य प्रोक्ष्य तत्स्थलम् ।।१२७।।**
**स्वं संभारांश्च भूभूत-शुद्धिं कृत्वा यथायथम् । प्राणान्प्रतिष्ठाप्य चान्तर् बहिर्मातृकया न्यसेत् ।।१२८।।**
**तनौ देवेऽपि पूंसूक्त-मन्त्रैश्चापि यथाक्रमम् । कराङ्घ्र्यूरुकटीनाभि-हृद्ग्रीवादोर्मुखाक्षिके ।।१२९।।**

अत्र अश्रद्धधानो संशयात्मा, नास्तिकः अधिकारी न। 'येभ्यो माता' इति पुं+गन्धं निवार्य अखिलान् संभारान् आदाय।१२६। उपविश्य, देवस्य अग्रे दक्षभागे घटं निधाय, अब्जं प्रपूज्य, तत् स्थलं प्रोक्ष्य, प्राणान् प्रतिष्ठाप्य च अन्तः बहिः मातृकया न्यसेत्।१२७-१२८। तनौ देवे अपि पुंसूक्त+मन्त्रैः च अपि यथाक्रमं कर+अङ्घ्रि+ऊरु+कटी+नाभि+हृत्+ग्रीवा+ दोः+मुख+अक्षिके (न्यसेत्)।१२९।

श्रद्धाहीन, संशयग्रस्त आणि नास्तिक यांना देवपूजेचा अधिकार नाही. '*शोकाक्रान्तः कृपाविष्टः श्रद्धया रहितः पुमान्। गुरुदेवद्विजातीनां पूजनं न समाचरेत्।।*' असे शास्त्रवचन आहे. माणसाच्या वासापासून देव दूर जातात त्या दुर्गंधाच्या निवारणासाठी '*येभ्यो माता*' आणि '*एवा पित्रो*' या मंत्रांचा उच्चार करावा. अर्भवाख्यानांत (ऐतरेय ब्राह्मण ३:३:६) मनुष्यगंधाला उबगून देवता अंतर्धान पावल्याचे सांगितले आहे. १२६. पूजेची सर्व सामग्री जमवून देवासमोर बसावे. देवाच्या उजव्या बाजूला पाण्याने भरलेला कलश ठेवावा. मग शंखाची पूजा करून त्यातील पाणी, पूजेची जागा, आपण स्वतः आणि पूजाद्रव्यांवर प्रोक्षण करावे. नंतर भूमी आणि भूत यांची शुद्धी करून अंतर्मातृका आणि बहिर्मातृका यांनी न्यास करावेत.१२७-१२८. तसेच स्वतःच्या शरीरावर आणि देवाच्या मूर्तीवर पुरुषसूक्तमंत्रांनी अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या मंत्रांनी हात, तिसऱ्या व चौथ्या मंत्रांनी पाय, पाचव्या व सहाव्या मंत्रांनी मांड्या, सातव्या व आठव्या मंत्रांनी कटीचे दोन्ही भाग, नवव्या मंत्राने नाभी, दहाव्या मंत्राने हृदय, अकराव्याने कंठ, बाराव्या व तेराव्या मंत्रांनी बाहू, चौदाव्या मंत्राने मुख, पंधराव्याने डोळे आणि सोळाव्या मंत्राने शीर असे न्यास करावेत. मागे सांगितल्याप्रमाणे अंगांचे न्यास करताना डावीकडून क्रम ठेवावा.१२९.

**एवं भूत्वा सुरोऽर्घ्यादि-पात्राण्यप्पूरितानि च । संस्थाप्येशकलां हृत्स्थाम् आपादतलमस्तकम् ।।१३०।।**
**ध्यात्वाञ्जलौ सुमगतां विभाव्यार्चागतां ततः । प्रकल्प्यार्चां देवरूपां साक्षान्मत्वा ततोऽर्चयेत् ।।१३१।।**
**सम्पूज्य पीठद्वाराशा मन्त्रतन्त्रविधानतः । पुंमन्त्रैर्वाह्वानपीठ-पाद्यार्घ्याचमनाप्लवान् ।।१३२।।**
**वस्त्रे सूत्रे गन्धपुष्पे धूपदीपाशनादिकम् । नतिप्रदक्षिणापुष्पाञ्जलीन्भक्त्याऽर्पयेत्क्रमात् ।।१३३।।**

एवं सुरः भूत्वा अप्+पूरितानि अर्घ्यादि पात्राणि च संस्थाप्य हृत्+स्थां आपाद+तल+मस्तकं ध्यात्वा अञ्जलौ सुमगतं विभाव्य ततः अर्चा+गतं प्रकल्प्य अर्चां साक्षात् देवरूपं मत्वा ततः अर्चयेत्।१३०-१३१। मन्त्र+तन्त्र+विधानतः पीठ+द्वार आशा सम्पूज्य पुं+मन्त्रैः आह्वान+पीठ+पाद्य+अर्घ्य+आचमन+आप्लवान्।१३२। वस्त्रे, सूत्रे, गन्ध+पुष्पे धूप+दीप+अशन+आदिकं नति+प्रदक्षिणा+पुष्पाञ्जलीन् भक्त्या क्रमात् अर्पयेत्।१३३।

आह्निककारिकेच्या '*देवो भूत्वा यजेद्देवम्*' या वचनानुसार या न्यासांनी देवरूप होऊन पाण्याने भरलेली पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान यांची भांडी आपापल्या जागी ठेवावी. हृदयस्थ ईश्वरकला (जीवात्मा) हीच गुरूपदिष्ट मूर्ती असे जाणून ती आपादमस्तक ध्यानात आणावी. तीच श्वासमार्गाने ओंजळीतील घेतलेल्या पुष्पांत गेली अशी भावना करावी. नंतर तीच फुले देवाला वाहून त्या फुलांतून ती देवाच्या मूर्तीत संक्रमित झाली अशी भावना करावी. मग ती मूर्ती साक्षात् देवतारूप असे मानून पूजा करावी.१३०-१३१. मंत्र आणि तंत्रविधानानुसार पीठद्वार आणि दिशा यांच्यासहित प्रतिमेचे पूजन करावे. किंवा पुरुषसूक्ताच्या मंत्रांनी क्रमशः आवाहन (*सहस्र..*), आसन (*पुरुष..*), अर्घ्य (*त्रिपादू..*), आचमन (*तस्माद्वि..*), स्नान (*यत्पुरुष..*), वस्त्रे (*तं यज्ञं..*), यज्ञोपवीत (*तस्माद्य..*), गंध (*तस्माद्य..*), पुष्पे (*तस्मादश्वा..*), धूप (*यत्पुरु..*), दीप (*ब्राह्मणो..*), नैवेद्य (*चंद्रमा..*), नमस्कार (*नाभ्या आ..*), प्रदक्षिणा (*सप्तास्या..*) आणि पुष्पांजली (*यज्ञेन..*) हे सोळा उपचार भक्तिपूर्वक समर्पण करावेत.१३२-१३३.

**(क्षेपकः) यजेत्पौराणिकैर्मन्त्रैः स्त्रीः शूद्रश्च द्विजोदितैः ।**
**संभवे सत्याप्लवादौ दद्यात्पञ्चामृतानि च । भूषाः सुभोगा गन्धोर्ध्वमशनेऽन्नं चतुर्विधम् ।।१३४।।**
**राजोपचारताम्बूल-दक्षिणारार्तिकैः फलैः । स्तोत्रैर्गीतैर्नृत्यवाद्यैस्तोषयेद् द्विजभोजनैः ।।१३५।।**
**घण्टानादं चरेदादौ स्नाने धूपप्रदीपयोः । दद्यादाचमनं स्नाने नैवेद्ये वस्त्रसूत्रयोः ।।१३६।।**
**जलं प्रत्युपचारं च शङ्खांब्वीशं विनाप्लुतौ । स्वारामारण्यक्रयाप्तं पुष्पं सन्मध्यमं त्वसत् ।।१३७।।**
**तद्वच्छ्वेतारक्तकृष्णं वर्ज्यं पर्युषितं सुमम् । सच्छिद्रं जन्तुयुक् शीर्णं कीटाद्यात्तं स्वयं च्युतम् ।।१३८।।**

स्त्रीः शूद्रः च द्विज+उदितैः पौराणिकैः मन्त्रैः यजेत्।क्षेपकः। संभवे सति, आप्लव आदौ पञ्चामृतानी, गन्ध+ऊर्ध्वं भूषा, सुभोगाः, अशने चतुर्विध अन्नं च दद्यात्।१३४। राज+उपचार+ताम्बूल+दक्षिणा+आरार्तिकैः फलैः स्तोत्रैः गीतैः नृत्य+वाद्यैः द्विज+भोजनैः तोषयेत्।१३५। स्नाने, धूप+प्रदीपयोः आदौ घण्टानादं चरेत्। स्नाने, नैवेद्ये, वस्त्र+सूत्रयोः आचमनं दद्यात्।१३६। प्रति+उपचारं जलं, ईशं विना आप्लुतौ शङ्ख +अम्बु (दद्यात्)। स्व+आराम+अरण्य+क्रय+आप्तं पुष्पं सन्, मध्यमं तु असत्।१३७। तत्+वत् श्वेत+आरक्त+कृष्णं (पुष्पम्)। पर्युषितं सच्छिद्रं, जन्तुयुक्, शीर्णं, कीट+आदि+आत्तं स्वयं च्युतं सुमं वर्ज्यम्।१३८।

भक्तिमान् स्त्रिया आणि शूद्रांनी ब्राह्मण पुरोहिताने सांगितलेल्या पौराणिक मंत्रांनीच पूजा करावी; वैदिक मंत्रांनी करू नये (क्षेपक). शक्य झाल्यास अभिषेकापूर्वी पंचामृतस्नान, गंधानंतर अलंकार, चांगले भोग, नैवेद्यांत चतुर्विध अन्न हे उपचारही अर्पण करावे.१३४. पूजेच्या आरंभी, स्नानाच्या वेळी, धूप आणि दीप दाखविताना घंटानाद करावा. तसेच स्नान, नैवेद्य, वस्त्रे आणि यज्ञोपवीत अर्पणानंतर आचमन द्यावे.१३५. राजोपचार, तांबूल, दक्षिणा, आरती, फळे, स्तोत्रपठण, गायन, नृत्य, वाद्य तसेच ब्राह्मणभोजनाने देवाला तुष्टवावे.१३६. प्रत्येक उपचारानंतर पाणी द्यावे. शिव सोडून इतर देवांना अभिषेकानंतर शंखोदक द्यावे. फले स्वतःच्या बागेतील उत्तम, अरण्यातील मध्यम आणि विकतची कनिष्ठ जाणावीत.१३७. त्याचप्रमाणे श्वेत पुष्प उत्तम, लाल मध्यम आणि काळे वाईट जाणावे. शिळी, भोके पडलेली, जन्तुयुक्त, फाटकी, किडे वगैरेनी खाल्लेली, आपोआप पडलेली फुले देवाला वर्ज्य आहेत.१३८.

**समलं वामहस्ताङ्घ्रि-स्पृष्टं क्षालितमम्बुनि । बकुलाब्जाशोकजाती-दूर्वाबिल्वं शमी कुशः ।।१३९।।**
**तुलसी करवीरं च मल्लिकाशोकमुत्तमम् । कोविदारार्कधत्तूर-शाल्मलीकुटजैर्हरिः ।।१४०।।**
**नार्च्यो गणेशस्तुलस्या दूर्वयार्येश्वरोऽसितैः । रक्तैः केतकनिम्बाद्यैर् बिल्वं श्वेतसुमं प्रियम् ।।१४१।।**
**दूर्वा गणेशस्य विष्णोस् तुलसीत्यादि सर्वशः । ज्ञात्वा पुष्पाणि देयानि श्रद्धया देवतुष्टये ।।१४२।।**
**हुत्वा पुंसूक्तेन दत्वा पुष्पाणि प्रार्थयेद्धरिः । मन्त्रं जपेद्यथाशक्ति भक्त्या तद्गतहृद्द्विजः ।।१४३।।**

समलं, वाम+हस्त+अङ्घ्रि+स्पृष्टं, अम्बुनि क्षालितं (पुष्पं वर्ज्यम्)। बकुल, अब्ज, अशोक, जाती, दूर्वा, बिल्वं, शमी, कुशः, तुलसी, करवीरं च मल्लिका, अशोकं उत्तमम्। कोविदार, अर्क धत्तूर, शाल्मली, कुटजैः हरिः न अर्च्यः।१३९-१४०। गणेशः तुलस्या, आर्या दूर्वया, ईश्वरः असितैः रक्तैः केतक-निम्बाद्यैः न अर्चयेत्। बिल्वं श्वेतसुमं प्रियम्।१४१। गणेशस्य दूर्वा, विष्णोः तुलसी इत्यादि सर्वशः पुष्पाणि ज्ञात्वा श्रद्धया देवतुष्टये देयानि।१४२। पुंसूक्तेन हुत्वा, पुष्पाणि दत्वा हरिः प्रार्थयेत्। द्विजः भक्त्या तद्+गत+हृत् यथाशक्ति मन्त्रं जपेत्।१४३।

मळ चिकटलेले, डाव्या हाताचा किंवा पायाचा स्पर्श झालेले पाण्यात धुतलेले फूलही वर्ज्य आहे. बकुळी, कमळ, अशोक, चमेली, दूर्वा, बेलपत्र, शमीपत्र, कुश,(१३९) तुळस, कण्हेर, मोगरा, अशोक ही उत्तम फुले होत. कांचन, रुई, धोतरा, सेमल, कुडा ही फले विष्णूला वाहू नयेत.१४०. गणपतीला तुळस, देवीला दूर्वा आणि शिवाला काळी व लाल फुले, तसेच केवडा, निम्ब इत्यादि फुले वाहू नयेत. शंकराला बिल्वपत्र आणि पांढरी फुले प्रिय आहेत.१४१. गणपतीला दूर्वा, विष्णूला तुळस इत्यादि सर्व फुले जाणून देवाला संतुष्ट करण्यासाठी श्रद्धापूर्वक अर्पण करावीत.१४२. नैवेद्यानंतर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेने चरु किंवा तूप यांची आहुती द्यावी त्याच मंत्रांनी देवाला फुले वाहावीत आणि हरीची सूक्ताने किंवा स्तोत्राने प्रार्थना करावी. नंतर त्रैवर्णिकांनी एकचित्ताने भक्तीने यथाशक्ती गुरूंनी उपदेशिलेल्या मंत्राचा जप करावा. शूद्रांनी ब्राह्मणाने सांगितलेल्या पौराणिक मंत्रानीच पूजा करावी. नामसंकीर्तन, स्मरण आणि श्रवण यांचा सर्वांनाच अधिकार आहे.१४३.

**द्विजदेवाङ्घ्र्यब्जतीर्थं पेयं धार्यं च मूर्धनि । चतुर्धाध्ययनं कुर्यात्स्ववृत्त्या पोष्यपोषणम् ।।१४४।।**
**स्ववृत्त्या जीवनाभावाद् गुर्वापद्यन्यवार्तया । जीवेतानिन्द्यया नैव हीनवृत्त्या कुटुम्ब्यपि ।।१४५।।**

द्विज+देव+अङ्घ्रि+अब्ज+तीर्थं पेयं मूर्धनि च धार्यम्। चतुर्धा अध्ययनं कुर्यात्। स्व+वृत्त्या पोष्यपोषणं (कुर्यात्)।१४४। स्ववृत्त्या जीवन+अभावात् गुरु+आपदि अनिन्द्यया अन्यवार्तया जीवेत। कुटुम्बी अपि हीनवृत्त्या न (जीवेत)।१४५।

प्रथम ब्राह्मणाचे व नंतर देवाचे चरणतीर्थ घेऊन मस्तकावर शिंपडावे. अध्ययन, अध्यापन, त्याच्या अर्थाचे चिंतन आणि प्रवचन असे चार प्रकारचे अध्ययन करावे. आपल्या वर्णानुसार विहित असलेल्या वृत्तीने अग्नी, गाय, अतिथी, आईवडील, पुत्र, भार्या इत्यादि पोष्यांचे पोषण करावे.१४४.

आपल्या विहित वृत्तीने उपजीविका होत नसेल तर दुसऱ्या चांगल्या वृत्तीचा अवलंब करावा. गृहस्थानेसुद्धा हीनवृत्तीचा आश्रय करू नये. ब्राह्मणाची मुख्य वृत्ती प्रतिग्रह (दान घेणे) आहे. ती अशक्य असल्यास अध्यापन आणि याजन (भिक्षुक, पौरोहित्य) किंवा अयाचित, यायावर, शिल आणि उञ्छ या वृत्ती शास्त्रसंमत आहेत. यायावर म्हणजे रोजच्या रोज धान्याची भिक्षा मागणे, कुसूल म्हणजे बारा दिवसांपर्यंतचा संग्रह करणे. कुम्भि म्हणजे सहा दिवसांचा संग्रह करणे. तीन दिवसांचा संग्रह किंवा निदान उद्याचा तरी संग्रह कलियुगांत करावा असे याज्ञवल्क्यस्मृतीत सांगितले आहे (*कुसूलकुम्भिधान्यो वा त्र्याहिकः श्वस्तनोऽपि वा। कलौ द्विजो न हि भवेदश्ववृत्तिः कथंचन।।*). यांपैकी कोणतीच उपजीविका शक्य नसेल तर क्षात्रवृत्तीने किंवा वैश्यवृत्तीने कुटुम्बाचे पोषण करावे. वृद्ध मातापिता, साध्वी भार्या, शिशु पुत्र यांच्या भरणपोषणसाठी करू नये तेही शंभर वेळा करावे असे मनूचे मत आहे (*वृद्धौ मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत्।।*) विविध स्मृतींतून यावर सविस्तर उहापोह केलेला आहे.१४५.

**कृतसन्ध्यः कृतोपस्थो जानुस्थसकुशाञ्जलिः । सोङ्कारव्याहृतिं देवीं रोदसीदत्तदृग्जपेत् ।।१४६।।**
**तां पच्छोऽर्धर्चशः सर्वां वेदान्साङ्गान्स्वशक्तितः । तिष्ठन्नासीनो व्रजन्वानध्यायेऽल्पं जपेत्ततः ।।१४७।।**
**त्रिर्नमो ब्रह्मण इति तर्पयेत्साक्षताञ्जलिः । देवानृषीन् तिलैः पितॄन् स्वगृह्योक्तविधानतः ।।१४८।।**
**यज्ञादिवर्ज्यमाशौचे कर्म मानसिकं चरेत् । यमाग्निपितृभे नन्दा शुक्रार्काहे जनुर्दिने ।।१४९।।**

कृत+सन्ध्यः कृत+उपस्थः जानुस्थ+सकुश+अञ्जलिः स+ओङ्कार+व्याहृतिं पत्+शः अर्ध+ऋचशः सर्वां देवीं रोदसी+दत्त+दृक् जपेत्।१४६। स+अङ्गान् वेदान् स्वशक्तितः तिष्ठन् आसीनः व्रजन् वा, अनध्याये अल्पं, 'त्रिः नमो ब्रह्मणे' इति जपेत्।१४७। स+अक्षत+अञ्जलिः देवान् ऋषीन्, तिलैः पितन् (च) स्व+गृह्य+उक्त+विधानैः तर्पयेत्।१४८। आशौचे यज्ञा+आदि+वर्ज्यं कर्म मानसिकं चरेत्। यम+अग्नि+पितृ+भे नन्दा शुक्र+अर्क+अहे जनुः+दिने,।१४९।

**ब्रह्मयज्ञ -** माध्याह्न संध्या आणि उपस्थान करून डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून ओंजळीत दर्भ घेऊन ती उजव्या गुडघ्यावर ठेवून ॐकार व व्याहृतींसह गायत्रीचा पदशः, अर्धा-अर्धा आणि पूर्ण जप करावा. या वेळी दृष्टी आकाश आणि पृथ्वी यांच्या संधीवर (क्षितिजावर) स्थिर केलेली असावी. यात आश्वलायनसूत्रांत वेगळे विधान सांगितले आहे. उपकर्मात पाण्याच्या कलशांत दर्भ ठेवून ब्रह्माञ्जली करावी असे विधान आहे. स्वशक्त्यनुसार, उठता-बसता किंवा चालताना सर्व वेदांचा पाठ करावा. ज्या दिवशी अनध्याय असेल तेव्हा थोडाच पाठ करावा. मग 'नमो ब्रह्मणे' या मंत्राचे तीन पाठ करावे.१४६-१४७. **पितृतर्पण -** मग आपापल्या गृह्यांत सांगितलेल्या विधानानुसार देव आणि ऋषी यांचे अक्षतांनी आणि पितरांचे तिळांनी तर्पण करावे.१४८. अशौच आले असता यज्ञादि कर्म वर्ज्य आहे. संध्या मानसिक करावी. भरणी (**यम**), कृत्तिका (**अग्नी**) आणि मघा (**पितृ**) या नक्षत्रांना, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या (**नंदा**) तिथींना, आपल्या जन्मदिवशी,(१४९)

**माङ्गल्येऽब्दतदर्धार्धं विवाहव्रतचौलतः । तिलैर्नैमित्तिकमृते तर्पयेन्न गृहे तु न ।।१५०।।**
**भीष्मं माघसिताष्टम्यां दीपाल्यां तर्पयेद्यमम् । नित्यैर्नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत् ।।१५१।।**
**त्रियज्ञाढ्यं वैश्वदेवं कुर्यात्सूनापनुत्तये । ध्याते कुण्डस्थापितेऽग्नौ दीप्तेऽन्नाद्याहुतीर्हुनेत् ।।१५२।।**

माङ्गल्ये विवाह+व्रत+चौलतः अब्द+तत्+अर्ध+अर्धं नैमित्तिकं ऋते तिलैः न तर्पयेत्। गृहे तु (तिलैः) न।१५०। माघ+सित+अष्टम्यां भीष्मं, दीपाल्यां यमं तर्पयेत्। नित्यैः नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत्।१५१। सूना+अपनुत्तये त्रि+यज्ञ+आढ्यं वैश्वदेवं कुर्यात्। कुण्डे स्थापिते ध्याते अग्नौ अन्नादि आहुतीः हुनेत्।१५२।

मंगलकार्यानंतर, विवाहानंतर एक वर्ष, मुंजीनंतर सहा महिने आणि चौलानंतर तीन महिने तिळांनी तर्पण करू नये. नैमित्तिक तिलतर्पणाला दोष नाही. घरी तिलतर्पण करू नये.१५०. माघ शुद्ध अष्टमीला '*वैयाघ्रपादगोत्राय सांकृत्यप्रवराय च। अपुत्राय ददाम्येतज्जलं भीष्माय तर्पणे*' या मंत्राने भीष्माचे आणि यम, धर्मराज, मृत्यू, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र आणि चित्रगुप्त या नावांनी यमाचे तर्पण करावे. निर्णयसिंधूप्रमाणे ज्याचा पिता जिवंत आहे त्यानीसुद्धा भीष्म आणि यम यांचे तर्पण करावे. अमावास्यादि शहाण्णव नित्य श्राद्धे आणि गयादि तीर्थाला जाऊन केलेल्या नैमित्तिक श्राद्धांच्या अनुष्ठानानेच पुत्राचे पुत्रत्व सार्थ होते. जिवंत असतांना आज्ञा पाळण्याने आणि मृत्यूनंतर दर वर्षी अन्नदानाने आणि गयेला जाऊन पिंडदान यांनीच पुत्राची पुत्र ही संज्ञा सार्थ ठरते (*जीवितो वाक्यकरणात्प्रत्यब्दं भूरिभोजनात्। गयायां पिण्डदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता।।*).१५१.

**वैश्वदेव -** पराशरस्मृतीनुसार उखळ, मुसळ, चूल, रांजण आणि झाडू या पाच सूनांचा दोष गृहस्थाश्रमात लागतो. तो स्वर्गाला जाऊ देत नाही. त्याचा परिहार करून आत्मशुद्धी होण्यासाठी देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ ह्या तीन यज्ञांनी युक्त असा वैश्वदेव करावा. अग्नीत हवन केले जाते तो देवयज्ञ, बली दिला जातो तो भूतयज्ञ, पितरांना दिला जातो तो पितृयज्ञ, स्वाध्यायाचे अध्ययन हा ब्रह्मयज्ञ आणि मनुष्यांना दिला जाणारा मनुष्ययज्ञ अशी पाच महायज्ञाची लक्षणे आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितली आहेत (आश्वलायन गृह्यसूत्र ३:१:३). कुण्डात स्थापन केलेल्या अग्नीचे ध्यान करून त्यात अन्नदिकांच्या आहुती समर्पण कराव्यात.१५२.

**प्रातः सायं बलीन्दद्यात् पितृभ्योऽपि बहिर्बलिम् । भूताद्युद्देशतः क्षिप्त्वा काङ्क्षेदतिथिमागतम् ।।१५३।।**
**कमप्यभ्यर्च्य शक्त्यान्नं देयमीश्वरतुष्टये । साद्यान्ताम्ब्वन्नं यतौ तत् स्वल्पमप्यद्रिसिन्धुवत् ।।१५४।।**
**बलावनुद्धृते नाद्यान्नोद्धरेच्च स्वयं बलिम् । नित्यं श्राद्धं चरेद्वान्नं दद्यादद्याच्च पोष्ययुक् ।।१५५।।**
**मन्त्रवत्परिषिच्यार्द्र-हस्ताङ्घ्र्यास्योऽविदिङ्मुखः । दक्षभागे बलीन्दत्वाऽहं वैश्वानर इत्यमुम् ।।१५६।।**
**स्मृत्वापो मन्त्रवत्प्राश्य हुतप्राणाहुतीर्ग्रसेत् । धृतपात्रः प्राणमन्त्रैरजावद्भोजनं चरेत् ।।१५७।।**

प्रातः सायं पितृभ्यः बलीन् दद्यात्। भूतादि उद्देशतः अपि बहिः बलीन् क्षिप्त्वा अतिथिं काङ्क्षेत्।१५३। कं अपि आगतं अभ्यर्च्य ईश्वर+तुष्टये शक्त्या अन्नं दद्यात्। यतौ स+आद्य+अंत+अम्बु+अन्नं तत् स्वल्पं अपि अद्रि+सिन्धु+वत्।१५४। बलौ अनुद्धृते न अद्यात्, स्वयं च बलिं न उद्धरेत्। नित्यं श्राद्धं चरेत्, अन्नं वा दद्यात्। पोष्ययुक् अद्यात्।१५५। मन्त्रवत् परिषिच्य आर्द्र+हस्त+अङ्घ्रि+आस्यः अविदिक्+मुखः दक्षभागे बलीन् दत्वा 'अहं वैश्वानर' इति अमुं स्मृत्वा, मन्त्रवत् प्राश्य, प्राणमन्त्रैः हुत+प्राण+आहुतीः ग्रसेत्। धृतपात्रः अजावत् भोजनं चरेत्।१५६-१५७।

सकाळी व संध्याकाळी बलिहरण करावे. पितरांना बली देऊन भूतादिकांसाठी बाहेर बली टाकावा आणि अतिथीची वाट पाहावी.१५३. त्या समयी जो कोणी मनुष्य येईल त्याची पूजा करून देवाच्या संतोषासाठी त्याला शक्त्यनुसार अन्न द्यावे. भिक्षेला आलेल्या संन्याशाला आधी व नंतर पाण्यासह थोडेही अन्न दिले तर ते पर्वताएवढ्या अन्नाचे आणि समुद्राएवढ्या जलाचे फळ देऊन जाते. यति आणि ब्रह्मचारी हे शिजवलेल्या अन्नाचे धनी आहेत. त्यांना अन्न न देता जेवल्यास चांद्रायण आचरावे. '*यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ। तयोरन्नमदत्वा तु भुक्त्वा चान्द्रायणं चरेत्।।*' (पराशर स्मृति १:४६).१५४. बलिहरणावरील झाकण काढल्यावरच जेवावे. ते स्वतः काढू नये. नित्य श्राद्ध तरी करावे किंवा तन्निमित्त अन्न तरी द्यावे. मग पिता, पुत्र आदि पोष्यांसह भोजन करावे.१५५.

**पात्रधारणमौने तु प्राणाहुत्यूर्ध्वमैच्छिके । तैजसे राजते हैमे ताम्रे जम्ब्वाम्रचम्पके ।।१५८।।**
**रम्भामधूककुटज-पनसोदुम्बरच्छदे । भोक्तव्यं मण्डलोर्ध्वस्थे विधवाव्रतिभिक्षुभिः ।।१५९।।**
**न तैजसेऽखिलैर्वल्ली-पलाशार्कवटादिषु । पीठस्थोऽप्यासनारूढः प्रसृतप्रोष्ठपात्र तु ।।१६०।।**

पात्र+धारण+मौने तु प्राण+आहुति+ऊर्ध्वं ऐच्छिके। मण्डल+ऊर्ध्वस्थे तैजसे, राजते, हैमे, ताम्रे, जम्बु+आम्र+चम्पके रम्भा+मधूक+कुटज+पनस+उदुम्बर+छदे भोक्तव्यम्। विधवा+व्रति+ भिक्षुभिः न तैजसे। अखिलैः वल्ली+पलाश+अर्क+वट+आदिषु (न भोक्तव्यम्)। पीठस्थः आसन+आरूढः प्रसृत+प्रोष्ठ+पात् तु न (भोक्तव्यम्)। १५८-१६०।

**भोजनविधी -** भोजनविधी प्रथम, दिवसां '*सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामि*' आणि रात्री '*ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामि*' या मंत्रांनी अन्नाभोवती पाणी शिंपडावे. नंतर हात, पाय आणि मुख ओले असताना, आग्नेयादि कोणाकडे मुख न करता उजव्या बाजूला आपापल्या उपदेशानुसार '*चित्राय नमः*' इत्यादि मंत्रांनी बली घालावेत. '*अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तं पचाम्यन्नं चतुर्विधम्।।*' (भ.गीता १५:१४) या मंत्राचे अर्थपूर्वक स्मरण करावे. '*वैश्वानरः साधारणशब्दविशेषात्*' या ब्रह्मसूत्रानुसार (१:२:२४) प्रत्यगात्माच होय. त्याचे स्मरण करून, '*अमृतोऽपस्तरणमसि स्वाहा*' या मंत्राने पाणी प्यावे. मग छांदोग्य उपनिषदांत (१:३:३) वर्णन केलेल्या प्राण, अपान आणि व्यान यांच्या स्वरूपाचा विचार करून '*श्रद्धायां निविष्टोऽमृतं जुहोमि शिवोमाविशप्रदाहय*' इत्यादि पाच प्राणमंत्रांनी प्राणाहुती दाताला स्पर्श न होऊ देता गिळाव्यात. मग पात्र धरून ठेवून शेळीसारखे शीघ्र भोजन करावे. प्राणाहुतीपर्यंत पात्र धरून ठेवणे व मौन ही पाळलीच पाहिजेत. नंतर मात्र ती ऐच्छिक आहेत. मंडल (ब्राह्मणांनी चतुष्कोण) करून त्यावर भोजनपात्र ठेवावे. पात्र कांस्य, चांदी, सोने ह्या धातूचे किंवा जांबू, आंबा, चाफा, केळी, महू, कुडा, फणस किंवा औदुंबर यांच्या पत्रावळीवर जेवावे. विधवा, मुंजा आणि संन्यासी यांनी काशाच्या पात्रात जेवू नये. वेली, पळस, रुई, वड इत्यादींची पाने सर्वांनाच वर्ज्य आहेत. पीठावर बसून, स्वस्तिकादि आसन घालून, पाय पसरून किंवा आसनावर पाय ठेवून जेवू नये.१५८-१६०.

**नार्भैर्वध्वोद्वाहमृते नाद्याद्दुष्टैकपङ्क्तिगः । द्वार्भस्माग्न्यप्स्तम्भमार्गैर्-भिन्द्यात्पङ्क्तिं तु संशये ।।१६१।।**
**नाद्यात्पाकाग्निदेवासद्गृहे सन्ध्यातिरात्रिषु । पीतशेषं ग्रासशेषं रात्रिपर्युषितं विना ।।१६२।।**
**तैलाज्यपक्वं शूद्रान्नमुदक्यादिविलोकितम् । केशकीटादियुक्पक्वं व्याद्युच्छिष्टं सदा त्यजेत् ।।१६३।।**
**कुसुम्भालाबुवृन्ताक-कोविदारवटादिकम् । कुस्थानोत्थान्नशाकादि-पलाण्डुलशुनाद्यसत् ।।१६४।।**
**सद्गोलुलायीदुग्धादि सदन्यासां तु गर्हितम् । कांस्येऽसन्नारिकेलेक्षु-रसो गव्यं च ताम्रके ।।१६५।।**

न अर्भैः, उद्वाहम् ऋते वध्वा, न दुष्ट+पङ्क्ति+गः अद्यात्। संशये तु द्वाः+भस्म+अग्नि+स्तम्भ+मार्गैः पङ्क्तिं भिन्द्यात्।१६१। पाक+अग्नि+देव+असत्+गृहे न अद्यात्। सन्ध्या+अतिरात्रिषु (न अद्यात्) पीतशेषं, ग्रासशेषं, विना तैल+आज्य+पक्वं रात्रिपर्युषितं, शूद्रान्नं, उदक्यादि+विलोकितं, केश+कीट+आदि+युक्+पक्वं वि+आदि+उच्छिष्टं सदा त्यजेत्।१६२-१६३। कुसुम्भ+अलाबु+वृन्ताक+कोविदार+वट+आदिकं कुस्थान+उत्थ+शाकादि पलाण्डु+लशुनादि असत्।१६४। सत्+गो+लुलायी+दुग्ध+आदि सत्। अन्यासां तु गर्हितम्। कांस्ये नारिकेल+इक्षु+रसः, ताम्रके गव्यं च असत्।१६५।

मुलांबरोबर एका पात्रात जेवू नये; तसेच पत्नीसहही, लग्नसमारंभाशिवाय एका ताटात जेवू नये. दोषी व्यक्तीच्या पंक्तीत जेवू नये. तसा संशय वाटल्यास दार, भस्म, अग्नी, खांब किंवा मार्ग यांनी पंगत तोडावी.१६१. स्वयंपाकघरात, अग्निशालेत, देवघरात आणि दुष्टघरी जेवू नये. संध्याकाळात, अपरात्री जेवू नये. पिऊन किंवा खाऊन उरलेले, तुपांत किंवा तेलांत तळलेले सोडून रात्रीचे शिळे अन्न, शूद्राचे अन्न, अस्पृश्य स्त्रीने पाहिलेले अन्न, केस, किडे इत्यादींसह शिजवले गेलेले, पक्षी वगैरेनी उष्टावलेले अन्न नेहमीच टाकून द्यावे.१६२-१६३. कुसुंब, भोपळा, वांगी, कांचन, वड इत्यादि, तसेच कुस्थानांत उपजवलेल्या भाज्या, कांदा, लसूण इत्यादि त्याज्य आहेत.१६४. चांगल्या, सवत्सा, चार सडांच्या गाईचे किंवा म्हशीचे दूध चांगले. इतरांचे - गाढवी, उंटीण, मेंढी इत्यादींचे त्याज्य आहे. नारळाचे पाणी आणि ऊसाचा रस काशाच्या भांड्यातून घेऊ नये. तसेच दूध तांब्याच्या पात्रात ठेवू नये.१६५.

**गुडः सदध्यार्द्रकोऽसन् केवलं लवणं त्वसत् । श्वोदक्यापतिताद्यारश्रवणे तद्विलोकने ।।१६६।।**
**भुक्तौ परस्परस्पर्शे नाद्यात्पङ्क्तिस्थ उत्थिते । गुरून्विनोलूखलादेर् नाद्याद्यावद्ध्वनि द्विज ।।१६७।।**
**नष्टे दीपे न भोक्तव्यं न मूत्राद्युत्सृतौ भुजिः । लेह्याद्यसद्धस्तदत्तं नोच्छिष्टं भाजने न्यसेत् ।।१६८।।**
**ग्रसेदास्याविकारेण ग्रासानष्टौ यतिर्वनी । षोडश द्वात्रिंशदन्यो वर्णीष्टं मधुरं द्रवम् ।।१६९।।**
**प्राङ्मध्येऽम्लादिकठिनं तिक्ताद्यन्ते द्रवं ह्यपि । सर्वं सशेषमश्नीयात् पायसाज्याब्धिजैर्विना ।।१७०।।**

स+दधि+आर्द्रकः गुडः असत्। केवलं लवणं असत्। श्व+उदक्या+पतित+आदि+आर+श्रवणे, तत्+विलोकने, भुक्तौ परस्पर+स्पर्शे, गुरून् विना पङ्क्तिस्थ उत्थिते, यावत् उलूखल+आदेः ध्वनि, न अद्यात्।१६६-१६७। नष्टे दीपे न भोक्तव्यम्। मूत्रादि उत्सृतौ भुजिः न। लेह्यादि हस्त+दत्तं असत्। उच्छिष्टं भाजने न न्यसेत्।१६८। यतिः आस्य+अविकारेण अष्टौ ग्रासान् ग्रसेत्। वनी षोडश, अन्यः द्वात्रिंशत्, वर्णी इष्टम्। प्राक् मधुरं द्रवं,।१६९। मध्ये अम्लादि कठिनं, अन्त्यं द्रवं (भोक्तव्यम्)। पायस+आज्य+अब्धिजैः विना सर्वं सशेषं अश्नीयात्।१७०।

दही किंवा आल्यात मिसळलेला गूळ त्याज्य आहे. नुसते मीठ खाऊ नये. कुत्रे, विटाळशी, पतित इत्यादींचा आवाज कानांवर पडला तर किंवा ते दृष्टीसमोर आल्यास, जेवताना एकमेकांना स्पर्श झाल्यास, गुरूंवाचून पंगतीतील एकही व्यक्ती उठल्यास जेवण सोडून उठावे. उखळ, मुसळ किंवा जाते यांचा आवाज होत असताना जेवण थांबवावे.१६६-१६७. जेवताना दिवा विझला तर जेवू नये. मलमूत्र उत्सर्ग झाल्यास जेवू नये. चटणी, श्रीखंड इत्यादि लेह्य पदार्थ हातांनी वाढले तर निषिद्ध आहेत. उष्टे ताटात ठेवू नये.१६८. तोंड वेडवाकडे न करता त्यात मावतील एवढेच घास घ्यावेत. संन्याशाने आठ घास घ्यावेत. वानप्रस्थाने सोळा आणि गृहस्थाने बत्तीस घास घ्यावेत. ब्रह्मचाऱ्याने हवे तितके जेवावे. सुरुवातीला गोड आणि पातळ पदार्थ खावेत,(१६९) मध्ये आंबट आणि कठीण पदार्थ आणि शेवटी कडसर, तुरट आणि पातळ पदार्थ खावेत. दूध, तूप आणि मीठ सोडून सर्व पदार्थ पानांत थोडे ठेवून खावेत.१७०.

**नाद्याद्व्रताऽहेर्कपर्व-नक्तं भूताष्टमी दिवा । तलप्रसृतशाखाभिर् भुक्तं फूत्कारतोऽप्यसत् ।।१७१।।**
**त्यक्त्वोच्छिष्टं क्षितौ मन्त्रात् पीतापोशनशेषकम्। कौ सिक्त्वा रौरव इति मन्त्राच्छुद्धकरास्यपात् ।।१७२।।**
**हस्तोद्धृष्टाम्बु सिक्त्वाक्ष्णोर्जपेच्छर्यातिमित्यपि । आतापिं चेति ताम्बूलं सत्पञ्चत्र्यैकपूगयुक् ।।१७३।।**
**साङ्गं प्राग्ब्रह्मणे दद्यादद्यान्नदोधवा यतिः । चूर्णाङ्घ्र्यग्रशिरोनं सत्पर्णं चाहोवशेषकम् ।।१७४।।**

व्रत+अहे अर्कपर्व+नक्तं, भूत+अष्टमी दिवा न अद्यात्। तल+प्रसृत+शाखभिः, फूत्कारतः अपि भुक्तं असत्। १७१। मन्त्रात् उच्छिष्टं क्षितौ त्यक्त्वा, पीत+आपोशन+शेषं 'रौरव' इति मन्त्रात् कौ सिक्त्वा, शुद्ध+कर+आस्य+पात् ।१७२। हस्त+उद्धृष्ट+अम्बु अक्ष्णोः क्षिप्त्वा, 'शर्यातिं' इति जपेत्। 'आतापिं' च इति अपि। ताम्बूलं पञ्च+त्रि+एक+पूग+युक् सत्।१७३। प्राक् स+अङ्गं ब्रह्मणे दद्यात्। अदः अधवा, यतिः न अद्यात्। पर्णं चूर्ण+अङ्घ्रि+शिरा+ऊनं सत्। अहः अवशेषकं...।१७४।

एकादशीच्या दिवशी, अमावास्येला रात्री तसेच अष्टमी आणि चतुर्दशीला दिवसा, जेवू नये. तळहाताने किंवा पसरलेल्या बोटांनी किंवा फुरके मारून जेवणे निषिद्ध आहे.१७१. '*यजमानकुले जाता*' या मंत्राने उच्छिष्ट भूमीवर टाकून, '*रौरवे पूयनिलये*' या मंत्राने आपोशनाचे शेष पाणी जमिनीवर टाकावे. नंतर हात, तोंड आणि पाय धुवून(१७२) '*शर्यातिं च सुकन्यां च च्यवनं शक्रमश्विनौ। भोजनान्ते स्मराम्येतान्यतश्चक्षुर्न हीयते।*' या मंत्राचा जप करीत दोन्ही हातांनी पाणी डोळ्यांवर शिंपावे. मग '*आतापिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्वाशेषं। सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छन्त्वरोगं मम चास्तु देहे।।*' हा मंत्र म्हणत पोटावर हात फिरवावा.१७३. पाच, तीन किंवा एका सुपारीचा विडा ग्राह्य आहे. त्रयोदशगुणी विडा आपण घेण्यापूर्वी ब्राह्मणाला द्यावा. विधवा आणि संन्यासी यांनी विडा खाऊ नये. विड्यासाठी नागवेलीचे पान न चुरलेले, देठ आणि शिरा काढलेले असावे. दिवसाचा उरलेला 'भाग' पुढच्या श्लोकाशी संबंधित आहे.१७४.

**नयेत्पुराणमननात् ततो नक्तं कृतक्रियः । स्वपेद्यामोर्ध्वं द्वियामं विष्णवर्पितसमक्रियः ।।१७५।।**
**सुमुहूर्तकृते तल्पे स्तुवन्निट्सुखशाय्यहीन् । त्रिसन्ध्ये न स्वपेद्भूत्यां धान्येऽह्न्यमरगोगृहे ।।१७६।।**
**न श्मशानाध्ववल्मीक-घोरदेश उदक्शिराः । नग्नो नोर्ध्वं देवगुर्वोः प्रवासे प्राक्पदः स्वपेत् ।।१७७।।**
**कार्या निशाद्ययामान्तं सङ्कटान्तरिता क्रिया । नैशा निशीथपर्यंतं प्रायश्चित्तं ततः परम् ।।१७८।।**

अहः अवशेषकं पुराण+मननात् नयेत्। ततः कृत+क्रियः नक्तः विष्णु+अर्पित+सम+क्रियः याम+ऊर्ध्वं द्वि+यामं स्वपेत्।१७५। सु+मुहूर्त+कृते तल्पे निट्+सुखशायी+अहीन् स्तुवन् (स्वपेत)। त्रि+सन्ध्ये, भूत्यां, धान्ये, अह्नि अमर+गो+गृहे,।१७६। श्मशान+अध्व+वल्मीक+घोरदेशे उदक्+शिराः, नग्नः, देव+गुरोः ऊर्ध्वं न (स्वपेत)। प्रवासे प्राक्+पदः स्वपेत्।१७७। सङ्कट+अन्तरिता क्रिया निशा+आद्य+याम+अन्तं कार्या। नैशा निशीथ+पर्यन्तम्। ततः परं प्रायश्चित्तम्।१७८।

उरलेला दिवस पुराणाच्या चिंतनात घालवावा. नंतर रात्रीची संध्या आणि पूजा करून दिवसभराची सर्व कर्मे विष्णूला अर्पण करावीत. भगवदुक्तीला अनुसरून आपण जे जे करतो, जे खातो, हवन करतो, दान करतो, तप करतो ते सर्व भगवंताला अर्पण करावे (*यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुषव मदर्पणम्।।* भ.गीता ९:२७). एक प्रहर रात्रीनंतर मधले दोन प्रहर झोप घ्यावी (म्हणजे सूर्योदयापूर्वी एक प्रहर उठावे).१७५. झोपेसाठी चांगल्या मुहूर्तावर केलेली खाट (पलंग) असावी. रात्र, सुखशायी (*अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः। कपिलो मुनिरास्तीकः पश्चैते सुखायिनः।।*) आणि सर्पांची (*यो जरत्कारुणो जातो..*) स्तुती करून निजावे. सकाळ, माध्याह्न आणि सायंकाळ ह्या तीन संध्याकाळात झोपू नये. राखेवर, धान्यावर, दिवसा, देवघरात, गोठ्यात,(१७६) श्मशानात, मार्गावर, वारुळाजवळ, भयाण जागी, उत्तरेला डोके करून, नागव्याने किंवा देव आणि वडिलांपेक्षा उंच जागेवर झोपू नये. प्रवासांत पूर्वेला पाय करून झोपावे.१७७. संकटामुळे न घडलेली दिवसाची विहित कर्मे रात्रीच्या पहिला प्रहर संपण्यापूर्वी करावीत. रात्रीची विहित कर्मे मध्यरात्रीपूर्वी करावीत. त्यानंतरही न घडल्यास प्रायश्चित्त घ्यावे.१७८.

**कर्मवैगुण्यादिदोषे लोपादावपि सर्वशः । प्रायश्चित्तं चरेद्विद्वान् यथावन्नान्यथा शुचिः ।।१७९।।**
**स्वर्क्षे स्वजायामृतूर्ध्वं शुद्धामुपगमेद्रहः । प्राक्चतुर्निट्श्राद्धतत्प्राग् दिनाहोव्रतपर्वसु ।।१८०।।**
**जन्माहाद्यष्टमीभूत-मूलान्त्यपितृभेषु नो । कैश्चिदुक्तं दशाब्दोर्ध्वं वर्णी स्यादृतुगः सदा ।।१८१।।**
**द्वेषादिनोपगच्छेद्यो नर्तौ स भ्रूणहाप्यृतौ । यो विदेशं व्रजेद्वन्ध्यां कन्यापुत्रान्वितामृते ।।१८२।।**

कर्म+वैगुण्य+आदि दोषे, लोपादौ अपि सर्वशः, विद्वान् यथावत् प्रायश्चित्तं चरेत्। अन्यथा शुचिः न।१७९। सु+अर्क्षे स्व+जायां शुद्धां रहः उपगमेत्। प्राक् चतुः+निट् श्राद्ध+तत्+प्राक्+दिन+अहो+व्रत+पर्वसु,।१८०। जन्म+अह+आदि+अष्टमी+भूत+मूल+पितृ+भेषु नो। कैश्चित् दश+अब्द+ऊर्ध्वं उक्तम्। सदा ऋतुगः वर्णी स्यात्।१८१। द्वेष+आदिना यो ऋतौ न उपगच्छेत स भ्रूणहा। यो ऋतौ, कन्या+पुत्र+अन्विता ऋते, विदेशं व्रजेत् अपि (भ्रूणहा)।१८२।

कर्म यथासांग न घडणे इत्यादि दोषांसाठी किंवा कर्माचा लोप झाला असता जाणीवपूर्वक शास्त्रानुसार योग्य ते प्रायश्चित्त घ्यावे. अन्यथा तो शुद्ध होत नाही.१७९. शुभ नक्षत्री, ऋतुकालानंतर शुद्ध झालेल्या स्वपत्नीसह एकांतात संभोग करावा. हे संभोगाला प्रवृत्त करणारे विधान नाही तर संभोगाला मर्यादा घालणारी परिसंख्या आहे. संभोग केलाच पाहिजे असे नाही. तर संभोग केलाच तर तो कुणाशी, कधी, कुठे करावा याचे नियमन आहे. ऋतुकालातील पहिल्या चार रात्री, श्राद्ध व त्याआधीचा दिवस, दिवसा, व्रतदिनी, पर्वकाळी,(१८०) जन्मादि तिथीदिवशी, अष्टमी, चतुर्दशी, मूळ, रेवती, मघा या नक्षत्रात संभोग वर्ज्य आहे. दहा वर्षांनंतर कन्येला रजस्वलत्व येते असे कांहीचे म्हणणे आहे. त्यापूर्वीच तिचा विवाह करावा. वरील नियम पाळून ऋतुकाळातच स्त्रीसंग करणारा गृहस्थही ब्रह्मचारी होतो.१८१. द्वेषादिकांमुळे जो ऋतुकाळात भार्येशी संग करीत नाही त्याला भ्रूणहत्येचे पाप लागते. तसेच ऋतुकाळात दूरदेशी जाणाऱ्यालाही भ्रूणहत्येचा दोष सांगितला आहे. पत्नीला मुले-मुली असतील किंवा ती वंध्या असेल तर हा दोष नाही.१८२.

**षोडशाहमृतुः कन्याऽसमेऽत्राह्नि समे सुतः । भवेन्निषेकसमये यादृक्चित्तविकल्पना ।।१८३।।**
**भ्रूणस्तद्वदतस्ताभ्यां सत्त्वं धार्यं हिताप्तये । पितृत्राता हि सत्पुत्रः प्रायोऽपुत्राः पतन्त्यधः ।।१८४।।**
**पितृतारक एकोऽपि सत्पुत्रोत्र ध्रुवादिवत् । किं कार्यं बहुभिर्दुष्टैर् धार्तराष्ट्रशतोपमैः ।।१८५।।**
**तारकोऽत्रैवमाचारः प्रोक्तः शाक्त्यादिसंमतः । विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भव ।।१८६।।**
**उभयीसिद्धिभाजस्ते य आचारं चरन्त्यमुम् । स्वाचारहीना दण्ड्याः स्युर् ब्राह्मणास्तु विशेषतः ।।१८७।।**

षोडश+अहं ऋतुः। अत्र असमे कन्या, समे सुतः। निषेक+समये यादृक् चित्त+विकल्पना भवेत्,।१८३। तत्+वत् भ्रूणः। अतः ताभ्यां हित+आप्तये सत्त्वं धार्यम्। प्रायः अपुत्राः अधः पतन्ति।१८४। अत्र ध्रुव+आदि+वत् एकः अपि सत्पुत्रः पितृतारकः। बहुभिः धार्तराष्ट्र+शत+उपमैः दुष्टैः किं कार्यम्?१८५। अत्र प्रोक्तः शाक्त्य+आदि+संमतः आचारः एव तारकः। विचार+आचारं आदाय कर्म कुर्वन् सुखी भव।१८६। ये अमुं आचारः चरन्ति ते उभयी+सिद्धि+भाजः। स्व+आचार+हीनाः दण्ड्याः स्युः। ब्राह्मणाः तु विशेषतः।१८७।

रजोदर्शनानंतर सोळा दिवसांचा ऋतुकाल असतो. त्यात विषम दिवशी कन्या व सम दिवशी पुत्र होतात. संभोगसमयी मनाची जशी चांगली-वाईट अवस्था असते तसेच मूल होते. यासाठी दंपतीनी मैथुनाच्या काळी चांगली संतती होण्यासाठी सत्त्ववृत्ती धारण करावी. बहुतेक पुत्रहीन अधोगतीला जातात.१८४. मनुष्यलोकात ध्रुवादिकांप्रमाणे एकसुद्धा सत्पुत्र पित्याला तारून नेतो. धृतराष्ट्राच्या शंभर मुलांसारखे दुष्ट पुत्र काय कामाचे?१८५. इथे निरूपिलेला पराशरादि मुनींनी पुरस्कारलेला आचारच तारक आहे. अनाचार हा मालिन्याला कारण आहे आणि अति आचार मूर्खपणाचा ठरू शकतो (*अनाचारस्तु मालिन्यमत्याचारस्तु मूर्खता। विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भवेत्।।*) ह्या स्मृतीच्या मार्गदर्शनानुसार विचारपूर्ण आचार करून कर्म करावे आणि सुखी व्हावे.१८६. जे हा आचारधर्म पाळतात ते ऐहिक आणि आमुष्मिक सिद्धी पावतात. आपला आचार सोडणारे, विशेषतः ब्राह्मण, शिक्षेला पात्र आहेत.१८७.

**इति गुरुमुखलब्धं धर्ममेनं चरन्स । द्विज इह सुखमिष्टं साधु भुक्त्वाऽप मोक्षम् ।**
**तत उदित इहासौ तिष्यलुप्तोऽपि धर्मो । विभुरपि लघुसिद्ध्यै भक्तियोगं ततान ।।१८८।।**

**।। इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मकाण्डकथनं नाम अष्टमोध्यायः ।।**

**।। आदितोऽष्टादशोऽध्यायः ।।**

इति गुरु+मुख+लब्धं एनं धर्मं चरन् सः द्विजः इष्टं साधु सुखं भक्त्वा मोक्षं आप। ततः असौ तिष्य+लुप्तः अपि धर्मः इह उदितः। विभुः अपि लघु+सिद्ध्यै भक्तियोगं ततान।१८८।

साक्षात् श्रीगुरूंच्या मुखातून लाभलेल्या ह्या धर्माचे आचरण करून तो ब्राह्मण ह्या जन्मात अभीष्ट आणि धर्म्य अशा सुखाचा उपभोग घेऊन अंती मोक्ष पावला. कलिकाळांत लुप्तप्राय झालेला हा धर्म तेव्हापासून प्रकट झाला. अशा रीतीने क्रिया, कारक, फल आदिरूप प्रपञ्च ज्या निष्प्रपंच आत्म्यावर भासतो त्या आत्म्याचे यथार्थ रूप दर्शविण्यासाठी अधिकारानुसार चित्तशुद्धीसाठी ह्या कर्मकाण्डाची रचना झाली. त्यानंतर कलियुगांत लवकर सिद्धीला जाणारा भक्तियोग मांडला आहे.१८८.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा कर्मकांडाचा पाचवा आणि आधीपासून अठरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुदेव दत्त।**

# ।। एकोनविंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**कर्मयोगं ज्ञानयोग-सहायं चित्तशोधनम् । उक्त्वापि भगवान्कस्माद् भक्तियोगं जगौ वद ।।१।।**

नामधारक उवाच। ज्ञान+योग+सहायं चित्त+शोधनं कर्म+योगं उक्त्वा अपि भगवान् भक्ति+योगं कस्मात् जगौ? वद।१।

श्रीगणेशाय नमः। *पांच अध्यायांत श्रीगुरु नित्यकर्म उपदेशिती। जेणेचि पाविजे द्विजांनी योग्यता आणि चित्तशुद्धि ।। श्रद्धा-भक्ति-ध्यानयोगे ज्ञान उपजे सांगे श्रुति।* (कैवल्य उपनिषत् २) *जयांचे चित्त शुद्ध तयांलागीं ध्यानासाठी भक्ति सांगती।। वंध्येच्या कुशीं पुत्रजन्म तशी शुष्क काष्ठा पालवी। दावुनि द्विजाचे कुष्ठ नासती एकोणिसाव्या अध्यायी।* नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, चित्तशुद्धीद्वारा ज्ञानयोगाला साह्यभूत असणारा कर्मयोग श्रीगुरूंनी सांगितला. मागच्या अध्यायात ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाची प्राप्ती करून देणाऱ्या आचारधर्माचे सार सांगून तो कसा मोक्षपर्यवसायी आहे तेही दाखविले. आता पुन्हा ह्या भक्तियोगाचे निरूपण भगवंतांनी का केले आहे?१.

सर्व साधनांचे कारणरूप भक्तीच या परमार्थात उत्तमोत्तम मार्ग आहे. या भक्तीचे स्वरूप विशद करताना श्रीस्वामिमहाराजांनी भक्तिमार्गातील दहा भूमिका दाखविल्या आहेत.

१. '**प्रथममसङ्गतया भगवदुद्देशेन स्वाश्रमोचित कर्मानुष्ठानम् ।**'

परमेश्वरप्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान हीच भक्तिमार्गाची पहिली भूमिका आहे. असा कर्मयोग ज्ञान व भक्ती या दोन्हींचा पायाच आहे. ज्ञानेश्वरमाउलींच्या मते कर्म करताना कर्तृत्वाचा अभिमान आणि फलाचा अभिलाष हे दोन बंध आहेत. 'तैसा कर्तृत्वाचा मद। आणि कर्मफळाचा आस्वाद। या दोहोंचेही नांव बंध। कर्माचा कीं।।' हा दुहेरी बंधांत न सांपडता केलेल्या कर्माने चित्तशुद्धी होते. ही भक्ती आणि ज्ञान या दोन्ही योगांना उपकारक आहे.

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्तिरेवानुत्तमात्र सर्वसाधनकारिणी । कर्मज्ञस्याप्यभक्तस्य मोघं कर्मेत्यथाब्रवीत् ।।२।।**

अत्र सर्व+साधन+कारिणी भक्तिः एव अनुत्तमा। अभक्तस्य कर्मज्ञस्य अपि कर्म मोघं इति। अथ (भक्तियोगं) अब्रवीत्।२।

२. **ततो महत्सेवा**.

असे ईश्वराच्या आराधनेसाठी स्वधर्माचे आचरण केल्याने ईश्वराची कृपा होते आणि ईश्वराभिन्न सद्गुरूंची प्राप्ती होते. संतांची किंवा सद्गुरूंची सेवा ही भक्तीची दुसरी भूमिका होय. (*ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात्सताम्। ईशप्रसादस्तद्रूपः सुलभश्चात्र सद्गुरुः।।*)

३. **ततस्तत्कृपा**.

संत आणि सद्गुरू यांच्या कृपेने ज्ञानाचे सर्व प्रतिबंध दूर होतात आणि चित्तातील सर्व दुर्भावना मावळतात. आणि मुक्तिदायक विज्ञान क्षणमात्रात प्रकट होते. '*सद्गुरोः संप्रसादेऽस्य प्रतिबंधक्षयस्तथा। दुर्भावनातिरस्काराद्विज्ञानं मुक्तिदं क्षणात्।।*' सद्गुरुकृपा ही भक्तीची तिसरी भूमिका आहे.

४. **ततस्तद्धर्मश्रद्धा**.

त्यानंतर त्यांच्या धर्मावर दृढ श्रद्धा होते.

५. **ततो भगवत्कथाश्रवणम्**.

पाचव्या भूमिकेत भगवंतांच्या कथांचे श्रवण घडते.

६. **ततो भगवति रतिः**

भगवंताच्या लीलांचे आणि गुणांचे श्रवण झाले की त्यांच्या पादपद्मी प्रेम उपजते.

७. **तया च देहद्वयविवेकज्ञानम्**.

ईश्वराच्या प्रेमातून स्थूल, सूक्ष्म, कारण या देहांचा विवेक होतो आणि आपण त्यापासून वेगळे असल्याची जाणीव होते.

८. **ततो दृढा भक्तिः**

मग भक्ती दृढ होते.

९. **ततो भगवत्तत्त्वज्ञानम्** .

दृढ भक्तीने भगवंताचे यथार्थ ज्ञान होते.

१० **ततस्तत्कृपया सर्वज्ञत्वादिभगवद्गुणाविर्भावः**

मग त्याच्याच कृपेने सर्वज्ञत्वादि त्याच्या गुणांचा आविर्भाव होतो. ही भक्तीची चरम भूमिका होय.

साहजिकच भक्तीचे परमश्रेष्ठत्व आणि सर्वसाधनकारित्व सिद्ध होते. भक्तीच्या अभावी तत्त्वज्ञानेही केलेले कर्म व्यर्थच आहे. ईशावास्योपनिषदात केवळ कर्माची उपासना करणारे गाढ अंधःकारांत प्रवेश करतात (*अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते।*९.) बृहदारण्यक उपनिषदांत (१:१५:१६) कर्माने पितृलोकाच्या प्राप्तीचे वर्णन असले तरी परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याच्या विषयी ते निरर्थकच ठरते. पितृलोकादि कर्माने प्राप्त होणारे लोक हे नश्वर आहेत; (छांदोग्य उ. ८:१:६). याउलट भगवत्प्रसादाने लभ्य असे ज्ञानरूप फल नित्य आहे असेच श्रुतींचे प्रतिपादन आहे. एका भक्तीनेच मोक्ष लाभतो असे सांगणाऱ्या अनेक श्रुती (*नान्यः पन्था विद्यतेऽयनाय।* श्वेताश्वतर उ.३:८) आणि स्मृती आहेत. '*तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते।।*' भ.गीता १०:१०. माझे निरंतर अनुसंधान ठेवून प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्या भक्तांना मी बुद्धियोग देतो, ज्यायोगे ते मला येऊन मिळतात.' '*पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।*' भ.गीता ८:२२. 'हे पार्था, तो परमपुरुष अनन्य भक्तीनेच लाभतो.' '*भक्त्या मामभिजानन्ति यावन्यश्चास्मि तत्त्वतः।*' भ.गीता १८:७५. या सर्व प्रमाणांवरून श्रीगुरूंनी चित्तशुद्धीकारक कर्मयोगानंतर ज्ञानप्रद भक्तियोगाचे निरूपण केले आहे.२.

**त्रिभिर्योगपथैरेव परस्परसहायकैः । ब्रह्माद्वन्द्वं समं शान्तं गम्यते नैकयोगतः ।।३।।**

त्रिभिः परस्पर+सहायकैः योगपथैः एव अद्वन्द्वं समं शांतं ब्रह्म गम्यते। न एक+योगतः।३।

कर्म, भक्ती आणि ज्ञान या तीनही परस्परांना साह्यभूत योगांच्या समुच्चयानेच निर्द्वंद्व, सम आणि शांत ब्रह्माची प्राप्ती होते. कोणत्याही एकाच योगाने नाही. हा फार महत्त्वाचा सिद्धांत श्रीस्वामिमहाराजांनी इथे मांडला आहे. हे तीनही मार्ग वेगवेगळे नसून एकमेकांना पूरक आहेत. त्या तिन्हींचा अवलंब क्रमशः केल्यानेच परमार्थ फलदायी होतो. केवळ कर्मयोगाचेच अनुष्ठान केले तर चित्तशुद्धी होईल; पण आत्मसाक्षात्कारासाठी आवश्यक ते ज्ञान होणार नाही. तसेच '*शास्त्रे परे च निष्णात*' अशा आचार्यांच्या प्रसादाने अपरोक्ष ज्ञान जरी झाले तरी त्याची धारणा होत नाही. असंभावना, विपरीतभावना इत्यादि प्रतिबंध चित्ताच्या मालिन्यामुळे अपरोक्ष ज्ञानालाही परोक्षासारखे करून टाकतात. आणि अपरोक्षसंस्कारसुद्धा भ्रमनिवृत्तीला असमर्थच ठरतो. परंतु भगवंताच्या भक्तीने चित्तातील मल समूल नष्ट झालेल्या आणि भगवंताकडूनच प्राप्त झालेल्या अपरोक्ष ज्ञानरूपी प्रसाद पावलेल्यांना मात्र कांही यत्न न करताच मोक्ष अगदी हाताच्या तळव्यावरच्या आवळ्यासारखा सुलभ आहे. म्हणूनच यमाने नचिकेताला सांगितले आहे की, ज्याला हा परमात्मा निवडतो त्यालाच तो प्राप्त होतो. (*यमेवैष वृणुते तमेव लभ्यः।* कठ उ. १:२:२३) श्वेताश्वतर उपनिषदांतही (६:२३) हाच सिद्धांत दृढ केला आहे. ज्याची देवावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच गुरूवर आहे त्यालाच हे अर्थ प्रकाशतात (*यस्य देवे परा भक्ति यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः।।*).३.

**श्रद्धालुः सात्त्विको भक्तो नितरां भगवत्प्रियः । सकार्ममपि तद्भिन्नं शश्वत्क्षिपति दुर्भवे ।।४।।**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मण्यपि कर्म यः । स लोके भक्तिमान्धीमान् मुच्यते कर्मबन्धनात् ।।५।।**

श्रद्धालुः सात्त्विकः भक्तः नितरां भगवत्+प्रियः। तत्+भिन्नं सकार्मं अपि शश्वत् दुः+भवे क्षिपति।४। यः कर्मणि अकर्म पश्येत अकर्मण्यपि कर्म (पश्येत्) सः लोके भक्तिमान् धीमान् कर्म+बन्धनात् मुच्यते।५।

देवाला प्रिय होण्याचा भक्ती हाच एक उपाय आहे. माझ्या ठायी चित्त स्थिर करून जे परम श्रद्धेने, निरंतर ध्यान-भजनाने माझी उपासना करतात ते मी सर्व योग्यांत श्रेष्ठ मानतो (*मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते। श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः।।* भ.गीता १२:२) या भगवंतांच्या वचनावरून श्रद्धावान् आणि सात्त्विक भक्त त्यांना अत्यंत प्रिय आहे हे दिसते. चित्तांत भक्ती नसेल तर कितीही कर्मशूर झाला तरी त्याला ईश्वर पुनःपुनः दुःखमय अशा जन्ममरणरूपी संसारांत फिरवत ठेवतो. कठोपनिषदांत (१:२:५) सांगितल्याप्रमाणे अज्ञानमूलक कर्मांतच मग्न असलेले, स्वतःला पंडित मानणारे आंधळ्याच्या मागे जाणाऱ्या आंधळ्यांसारखे मूढ वेड्यावांकड्या मार्गांत फिरून संसारदुःख भोगतात. '*अविद्यायामन्तरे वर्तमानः स्वयं धीराः पण्डितम्मन्यमानाः। दन्द्रम्यमाणाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः।।*' भगवद्गीतेतही श्रीकृष्ण ह्याचीच पुष्टी करतात. त्या (आसुरी प्रवृत्तीच्या) द्वेषी, क्रूर नराधमांना मी वरचेवर संसारात अशुभ आणि आसुरी योनीत टाकतो (*तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु।।*).४.

हा श्रीमद्भगवद्गीतेतील (४:१८) श्लोकाचा अनुवाद आहे. लोहचुंबक आपल्या केवळ सान्निध्याने लोहांत गती निर्माण करतो. तसाच हा प्रत्यगात्मा (जीवात्मा) बुद्धी आणि इंद्रियांचा चालक आहे म्हणून त्यालाच '**कर्म**' ही संज्ञा दिली आहे. चालक असूनही त्याला त्यापासून कांहीही अभिमानादि विकार होत नाहीत. अशा आत्म्याशी इन्द्रियांकडून होणाऱ्या क्रियारूपी कर्माचा कांहीच संबंध नसतो.

**भक्तियोगमयं तस्य भक्तिगम्यस्य चेष्टितम् । शृणु तस्मिन्दृढा भक्तिः पूता यच्छ्रवणाद्भवेत् ।।६।।**

तस्य भक्ति+गम्यस्य भक्ति+योग+मयं चेष्टितं शृणु यत्+श्रवणात् पूता तस्मिन् दृढा भक्तिः भवेत्।६।

हाच संबंधाचा अभाव म्हणजे '**अकर्म**'. अर्थात् सर्व कर्माच्या चालक आत्म्याशी बुद्धी, इंद्रिये इत्यादींच्याकडून होणाऱ्या कर्माशी कांहीच संबंध नाही असे जो जाणतो तोच खरा बुद्धिमान. तसेच बुद्धी, इंद्रिये इत्यादि जड वस्तूंच्या ठायीच (**अकर्मणि**) जो जाणणे, ऐकणे, पाहणे इत्यादि कर्मे पाहतो तोच खरा बुद्धिमान. सर्वसाधारण जीवमात्र बुद्धी, इंद्रिये आदि उपाधीशी तादात्म्य झाल्याने आत्म्यावर (स्वतःवर) कर्तृत्वाचा आरोप करून भ्रमांत पडतात. *प्रकृति करी कर्मैं । तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ।।* ज्ञानेश्वरी १८:३२६।।. जो विवेकी आहे, खरा शहाणा आहे, तो कर्माच्या ठिकाणी अकर्म पाहतो आणि अकर्माच्या ठिकाणी कर्म पाहतो. आपण बसलेली आगगाडी फलाटावरच उभी असूनही शेजारची गाडी सुटली की आपली गाडीच उलट दिशेने चालू लागल्याचा दृष्टिभ्रम होतो. तसाच अविद्येच्या मोहात सापडलेला जीव आपल्या ठिकाणी कर्म पाहतो. पण ते इंद्रियादि जड प्राकृतिक उपाधीचे (अकर्माचे) आहे असे जाणणारा बुद्धिमानच कर्मबंधांतून सुटतो. मोक्ष पावतो.५.

**भक्तीची व्याख्या -** त्या भक्तिगम्य श्रीगुरूंच्या भक्तियोगाने भरलेल्या लीला ऐक, ज्या ऐकून चित्त शुद्ध होऊन त्यांच्या ठायी दृढ भक्ती जडते. भक्ती म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी अनुरक्ती. **भज** धातूपासून हा शब्द झालेला आहे. *भज* या धातूला क्तिनि प्रत्यय लावून भक्ती हा शब्द होतो. हा भावात्मक घेतला तर *भजन* असा अर्थ होतो; तोच अधिकारार्थी घेतला तर ज्या क्रियेत जीव आणि ईश्वर वेगळे असतात (*विभेज्येते*) ती भक्ती; आणि करणार्थी भक्ती म्हणजे जिच्या योगाने कामादि दोषांचे भर्जन होते (*भज्यन्ते*) ती भक्ती.६.

**भिक्षां सशिष्यगुरव एकैकः प्रत्यहं ददौ । भास्कराख्यो द्विजो दीन आययौ तत्र भक्तिमान् ।।७।।**
**आदाय गुरवे भिक्षां दातुकामो गुरुप्रियः । स त्रिपुंभुक्तिपर्याप्तं तण्डुलादिकमाप तम् ।।८।।**
**तद्दिने केनचिद्दत्ता भिक्षा श्रीगुरवे वरा । शिष्यभक्तयुजे तत्र सोऽपि भोक्तुं ययौ द्विजः ।।९।।**
**सायमेत्य मठे भिक्षा-द्रव्यमादाय स द्विजः । सुष्वापैवं त्रिमासं स तत्र तस्थौ सुभाविकः ।।१०।।**

स+शिष्य+गुरवे प्रति+अहं एक+एकः भिक्षां ददौ। तत्र भास्कर+आख्यः दीनः भक्तिमान् द्विजः आययौ।७। सः गुरु+प्रियः गुरवे भिक्षां दातुकामः त्रि+पुं+भुक्ति+पर्याप्तं तण्डुल+आदिकं आदाय तं आप।८। तत् दिने केनचित् शिष्य+भक्त+युजे श्रीगुरवे वरा भिक्षा दत्ता। सः द्विजः अपि तत्र भोक्तुं ययो।९। सायं एत्य सः द्विजः भिक्षा+द्रव्यं आदाय मठे सुष्वाप। एवं सः सुभाविकः तत्र त्रि+मासः तस्थौ।१०।

गाणगापुरी रोज पाळीपाळीने एक एक ब्राह्मण श्रीगुरूंना शिष्यांसहित भिक्षेला बोलावीत. एकदा तिथे भास्कर नावाचा एक गरीब पण भक्तिमान ब्राह्मण आला.७. श्रीगुरूंवर प्रीती करणारा तो ब्राह्मण त्यांना भिक्षा देण्याच्या इच्छेने तीन माणसांच्या जेवण्यापुरते तांदूळ आदि साहित्य घेऊन त्यांच्याकडे मठांत आला.८. त्या दिवशी कुणी तरी श्रीगुरूंना शिष्य-भक्तांसहित उत्तम पक्वान्नसहित भिक्षा दिली. तो भास्कर ब्राह्मणही त्यांच्याबरोबर तिकडेच जेवायला गेला.९. जेवून संध्याकाळी परतल्यावर तो ब्राह्मण आपण आणलेली भिक्षेची सामुग्री घेऊन मठातच झोपला. अशा रीतीने रोजच श्रीगुरूंच्या पंक्तीला जेवून परत येऊन मठात झोपण्याचा त्याचा क्रम सुरू झाला. पाहता पाहता तीन महिने असेच गेले.१०.

**तं तत्रोपहसन्ति स्म प्राप्य स्वल्पान्नतो गुरुम् । भिक्षां दातुं प्राज्यशिष्यं पुष्णाति स्वमितीतरे ।।११।।**
**तज्ज्ञात्वा तं प्रभुः प्राह भक्तियोगविधित्सया । द्राङ्मे सशिष्यभक्ताय भिक्षां देह्यद्य भाविक ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा हृषितः शाक-सितादुग्धघृतादिकम् । स आनीय स्वयं पाकं कर्तुमारेभ उत्तमम् ।।१३।।**

तत्र तं स्वल्प+अन्नतः प्राज्य+शिष्यं गुरुं भिक्षां दातुं प्राप्य स्वं पुष्णाति' इति इतरे हसन्ति स्म।११। प्रभुः तत् ज्ञात्वा भक्ति+योग+विधित्सया तं प्राह, '(हे) भाविक, अद्य स+शिष्य+भक्ताय मे द्राक् भिक्षां देही'।१२। तत् श्रुत्वा हृषितः सः शाक+सिता+दुग्ध+घृत+आदिकं आनीय स्वयं उत्तमं पाकं कर्तुं आरेभे।१३।

त्याचा हा क्रम पाहून इतर लोक त्याची थट्टा करू लागले, 'हा पहा, मोठा शिष्यपरिवार असलेल्या आपल्या गुरूंना भिक्षा द्यायला म्हणून मोजकी सामुग्री घेऊन आला आहे; पण त्या निमित्ताने आपलेच उदरभरण करतो आहे.'११. त्या लोकांनी केलेला त्याचा उपहास श्रीगुरूंच्या ध्यानात आला. तेव्हा भक्तियोगाचे प्रात्यक्षिक दाखविण्याच्या इच्छेने ते भास्कराला म्हणाले, 'अरे भाविका, आज मला सर्व शिष्य आणि भक्तांसहित लवकर भिक्षा दे.'१२. ते ऐकून भास्कर एकदम आनंदित झाला. त्याने लगेच साखर, दूध, तूप वगैरे पदार्थ आणले उत्साहाने स्वतःच उत्तम स्वयंपाक करायला लागला.१३. त्या वेळी दुसऱ्या एका भक्ताने श्रीगुरूंना भिक्षा देण्याची इच्छा प्रकट केली. त्याला, 'तू उद्या भिक्षा दे' असे सांगून ते भास्कराला म्हणाले, 'सगळ्यांना आमंत्रण कर!' पहिले कुणाचे भिक्षेचे बोलावणे नसताना 'उद्या बोलव' असे सांगणे संन्यासधर्माच्या नियमात बसत नाही. पण इथे श्रीगुरूंसाठी '**अज**' शब्दाची योजना करून ते जन्ममरणादि विकारांच्या पलीकडे असल्याचे सूचित केले आहे. धर्मरक्षणासाठी स्वेच्छेने नरदेह धारण केलेल्या भक्तपराधीन पूर्णकाम श्रीगुरूंनी क्वचित् भक्तवात्सल्याने संन्यासधर्माची मर्यादा उल्लंघन केली तरी त्याचा त्यांना यत्किञ्चितही दोष लागत नाही. ज्ञानी पुरुषांनी विधिनिषेधाचे अतिक्रमण केले तरीही त्यांचे ज्ञान अबाधितच राहते. ब्रह्मज्ञानी पुरुषाचा महिमा नित्य आहे. तो कर्मामुळे वाढत वा घटत नाही असे बृहदारण्यक उपनिषदाचे (४:४:२३) प्रतिपादन आहे. (*एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा न कनीयान्।*). अर्थात् शिष्यांनी मात्र त्यांचे अनुकरण करून चालणार नाही.

**दातुं तदान्यमप्युत्कं भिक्षां देहि श्व इत्यजः । तं निवार्याह्वयाशेषान्भोक्तुमित्याह भास्करम् ।।१४।।**
**तच्छुत्वाप्याह्वयत्तान्स त ऊचुर्लज्जसे न किम् । पक्तान्नकणतुल्यान्नः किमाहूय करिष्यसि ।।१५।।**

तदा अन्यं अपि भिक्षां दातुं उत्कं अजः 'श्वः देहि' इति निवार्य, 'अशेषान् आह्वय' इति भास्करं आह।१४। तत् श्रुत्वा सः तान् आह्वयत्। ते ऊचुः। 'न लज्जसे किम्? पक्त+अन्न+कण+तुल्यात् नः आहूय किं करिष्यसि?'१५।

तैत्तिरीय उपनिषदाच्या आदेशानुसार, 'जे आमचे सुचरित आहे त्याचेच तू अनुकरण कर, इतरांचे नाही.' (*यान्यस्माकं सुचरितव्यानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि।*) केवळ पूर्वीच्या माहात्म्यांनी केले म्हणून त्याचे अनुकरण करणे श्रुतीला मान्य नाही. परशुरामानी मातेचा वध केला; शुनःशेपाने पित्याचा, याज्ञवल्क्याने आचार्यांचा, गौतमाने इंद्ररूप अतिथीचा त्याग केला; बह्मदेवांनी आपल्या कन्येशी संग केला; इंद्राने पुरोहिताचा वध केला; बलरामाने क्षत्रिय असून सुरापान केले, तसेच पुराणिकाचा वध केला; चंद्राने गुरुपत्नीचे अपहरण केले; म्हणून आपणही तसेच वागावे असे नाही तर या महान पुरुषांनी जी प्रसिद्ध, दोषरहित, अनिंद्य, शास्त्रमान्य, लोकमान्य अशी लौकिक व वैदिक कर्तव्ये केली त्यांचे अनुकरण करावे असा वेदवाक्याचा आशय आहे. उदाहरणार्थ, परशुरामाने अत्यंत दुष्कर असूनही पित्याची आज्ञा पाळली; शुनःशेपाने विश्वामित्राच्या उपकाराची जाणीव ठेवली; याज्ञवल्क्याने तपाचरणाने सूर्याला प्रसन्न करून शुक्लयजुर्वेदाचे प्रतिपादन केले; गौतमाने स्वपत्नीशी व्यभिचार करणाऱ्या इंद्राचेही प्राण घेतले नाहीत; ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या उत्पत्तीसाठी प्रचंड श्रम केले; साक्षात् शेष असूनही देवब्राह्मणांच्या कार्यासाठी बलरामाने मानवाचा देह स्वीकारला; त्रैलोक्याच्या स्वास्थ्यासाठी इंद्राने अतिनिंद्य असे ब्रह्महत्येचे पाप अंगीकारले; चंद्राने गुरूंची महान् कीर्ती वाढविली इत्यदि सत्कर्मांचे अनुकरण करावे, असा श्रुतीचा आदेश आहे. श्रीगुरूंनी केलेल्या राजोपचारांचे धारण, पालखीत बसणे इत्यादि अन्य कर्मे सुद्धा त्यांच्या तेजस्वीयतेमुळे निंदनीय नाहीत. मात्र इतरानी त्यांचे अनुकरण केल्यास त्यांचे पतन होणार हे निश्चित!१४. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो ब्राह्मणांना आमंत्रण करू लागला. ते त्याला म्हणाले, 'तुला कांही लाजलज्जा आहे की नाही? तू शिजवलेल्या अन्नांत जेवढे कण आहेत तितकेच आम्ही जेवणारे आहोत. आम्हाला बोलावून काय करणार आहेस?'१५.

**तच्छ्रुत्वैत्य गुरुं तत्स शशंस भगवांस्तदा । आनयित्वात्र भोक्तव्यं सर्वैरित्याह तान्गुरुः ।।१६।।**
**शङ्किता अपि तद्वाक्यात् तूष्णीं स्थित्वा बहूनि ते । निर्माय भुक्तिपात्राणि सर्वे स्नात्वाययुः पुनः ।।१७।।**
**शाट्येशस्याज्ञयाच्छाद्य सिद्धान्नं तीर्थमन्त्रितम् । सहान्यैः षड्विधं सोऽदाद् गुरवे ब्राह्मणैः सह ।।१८।।**
**भक्ताञ्छिष्यान्स तत्रत्यां-स्त्र्यपत्येष्टयुजो द्विजान् । गुरुं चेष्टं सुखं भोक्तुं प्रार्थयामास सादरम् ।।१९।।**
**परमान्नान्नपौल्याज्य-सूपशाकादिषड्रसैः । षोढान्नममितं नीतं त्रिपुंपर्याप्तपाकतः ।।२०।।**

तत् श्रुत्वा सः गुरुं एत्य शशंस। तदा भगवान् गुरुः तान् अत्र आनयित्वा, 'सर्वैः भोक्तव्यम्', इति आह।१६। ते शंकिता अपि तत्+वाक्यात् तूष्णीं स्थित्वा सर्वे बहूनि भुक्ति+पात्राणि निर्माय स्नात्वा पुनः आययुः।१७। सः ईशस्य आज्ञया तीर्थ+मन्त्रितं षड्+विधं सिद्धान्नं शाट्या आच्छाद्य अन्यैः ब्राह्मणैः सह गुरवे अदात्।१८। सः तत्रत्यां स्त्री+अपत्य+इष्ट+युजाः द्विजान् गुरुं च, इष्टं सुखं भोक्तुं सादरं प्रार्थयामास।१९। त्रि+पुं+पर्याप्त+पाकतः परमान्न+अन्न+आज्य+सूप+ शाकादि षड्रसैः षोढान्नं अमितं नीतम्।२०।

त्यांचे ते बोलणे ऐकून तो बिचारा श्रीगुरूंकडे आला आणि त्याने त्यांना ते सांगितले. तेव्हां श्रीगुरू भगवान् म्हणाले, त्या सर्वांना इकडे आणून त्यांच्याबरोबरच आज जेवायचे आहे. हा श्रीगुरूंचा निरोप ऐकल्यावर त्या ब्राह्मणांनी मनांतला संशय मनांतच ठेवून सगळ्यांनी पत्रावळी केल्या आणि स्नानादिक उरकून मठात आले.१७. मग त्या भास्कर ब्राह्मणाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार केलेल्या सर्व स्वयंपाकावर मंत्रित तीर्थाने प्रोक्षण केले आणि त्यावर श्रीगुरुदेवांची छाटी टाकली. मग इतर कांही ब्राह्मणांच्या मदतीने ते सहा प्रकारचे अन्न श्रीगुरूंना आणि ब्राह्मणांना वाढले. नवव्या अध्यायात भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चार प्रकारचे (चतुर्विध) अन्न सांगितले. त्यांत पापड कुरुड्या इत्यादि चर्व्य आणि दूध, पानक इत्यादि पेय हे दोन प्रकार धरून षड्विध अन्न होते.१८. मग त्या भास्कराने गाणगापूरच्या सर्व ब्राह्मणांना, त्याच्या स्त्रिया, मुले, इष्ट आदिंसहित सर्वांना आणि श्रीगुरूंना आदराने हात जोडून हवे ते सुखाने जेवण्यासाठी प्रार्थना केली.१९. तीन माणसांपुरत्याच केलेल्या त्या स्वयंपाकातून पायस, पोळ्या, तूप, वरण, भाज्या इत्यादि षड्रसपूर्ण (गोड, तिखट, आंबट, खारट, तुरट व कडू) षड्विध अन्न किती नेले त्याची मोजदाद नाही.२०.

**नीत्वा नीत्वापि भोक्तृभ्यो दत्तं तत्र तु पूर्ववत् । नाप्यल्पं दातृभिस्तष्टं चेष्टा भगवतस्त्वियम् ।।२१।।**
**भुक्तं सशेषमाकण्ठं तृप्ताः स्मोऽलमिति द्विजाः । उक्त्वोत्तस्थुः सहाजेन ततो गुर्वाज्ञयाङ्घ्रिजान् ।।२२।।**
**हीनांश्चाहूय तेभ्योऽदात्कामं नान्नं व्यहीयत । पशुपक्षिमृगादिभ्यः प्रकामं स उपानयत् ।।२३।।**
**न शिष्टास्तत्र केपीति श्रुत्वा भुक्त्वा तदाज्ञया । यादोभ्योऽदात्स शेषान्नं तदा निःशेषतां ययौ ।।२४।।**
**माधुर्यं सुरसान्नस्य दुर्लभं ह्यमृतान्धसाम् । स्वप्नेऽपि न श्रुतं रुच्यं तृप्तिरेषाप्यलौकिकी ।।२५।।**

नीत्वा नीत्वा भोक्तृभ्यः दत्तं तत्र तु पूर्ववत्। न अल्पं न अपि दातृभिः तष्टम्। इयं तु भगवतः चेष्टा।२१। द्विजाः सशेषं 'आकण्ठं भुक्तं', 'तृप्ताः स्मः', 'अलं' इति उक्त्वा अजेन सह उत्तस्थुः। तदा सः गुरु+आज्ञया हीनां च आहूय तेभ्यो कामं (अन्नं) अदात्, अन्नं न व्यहीयत्। सः पशु+पक्षि+मृग+आदिभ्यः प्रकामं उपानयत्।२२-२३। 'के अपि न शिष्टा' इति श्रुत्वा तत्+आज्ञया भुक्त्वा सः शेष अन्नं यादोभ्यः अदात्। तदा निःशेषतां ययौ।२४। सुरस+अन्नस्य माधुर्यं अमृत+अन्धसां हि दुर्लभम्। स्वप्ने अपि न श्रुतं रुच्यम्। एषा तृप्तिः अपि अलौकिकी।२५।

भरभरून नेऊन जेवणाऱ्यांना वाढले तरी ते छाटीखालचे अन्न जसेच्या तसेच राहिले. न त्यात कांही घट झाली, न वाढणाऱ्यांनाही कमी पडले! ही अष्टैश्वर्यसंपन्न भगवंताचीच लीला होय.२१. सगळे ब्राह्मण 'पुरे, पुरे', 'आम्ही तृप्त झालो', 'गळ्यापाशी अन्न आले', असे म्हणत श्रीगुरूंच्या सह उठले. मग श्रीगुरूंच्या आज्ञेने भास्कराने शूद्रादिकांना बोलावून त्यांना यथेच्छ अन्न वाढून दिले. तरीही ते कमी झाले नाही असे पाहून पशुपक्ष्यांनाही भरपूर घातले.२२-२३. शेवटी गावात कुणीही जेवायचे राहिले नाही याची खातरजमा करून तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने जेवला. नंतर उरलेले अन्न त्याने नदीत जलचरांना घातले तेव्हा कुठे ते अन्न संपले.२४. तिथे जेवलेले लोक म्हणू लागले, या रसभरित अन्नाची गोडी खरोखर देवदुर्लभ आहे. स्वप्नातही इतके रुचकर अन्न खायला काय ऐकायलाही मिळाले नाही. या अन्नाने आलेली ही तृप्तीसुद्धा अलौकिक आहे.२५.

**प्राक्पार्थसङ्कटेऽरण्ये निशीथेऽदात्स्वमायया । ऋषिभ्योऽन्नं हरिरिति श्रुतं दृष्टं त्वदोऽत्र तु ।।२६।।**

'प्राक् हरिः पार्थ+सङ्कटे अरण्ये निशीथे स्व+मायया ऋषिभ्यः अन्नं अदात् इति श्रुतम्। अत्र तु दृष्टम्।२६।

'पूर्वी पांडवांवरील संकटाचे निवारण करण्यासाठी श्रीकृष्णांनी अरण्यांत आपल्या मायेच्या प्रभावाने ऋषींना अन्न दिले असे ऐकले होते. पण आज मात्र प्रत्यक्ष पाहण्यात आले.' ही महाभारतातील कथा थोडक्यात अशी. एकदा दुर्योधनाने दुर्वास ऋषींचे आतिथ्य करून त्यांना प्रसन्न करून घेतले. त्यात त्याचा हेतू असा होता की द्यूतांत राज्य गमावून वनवासात असलेल्या पांडवांचा दुर्वास ऋषींच्या शापाने नाश व्हावा. म्हणून दुर्योधनाने त्यांना असा वर मागितला की, 'आमच्या कुळांत युधिष्ठिर ज्येष्ठ आहे. त्याचेही आतिथ्य आपण स्वीकारावे. मात्र आमच्या द्रौपदीवहिनी उपाशी असतांना आपण जाऊ नये. त्यांचे जेवण झाले की मग जावे.' दुर्वास मुनी पांडवांच्या घरी रात्रीच्या वेळी गेले. युधिष्ठिराने परमादराने त्यांचे स्वागत केले आणि आह्निक उरकून जेवायला येण्याची विनंती केली. आपल्या शिष्यसंघाबरोबर मुनी नदीवर स्नानादिकांसाठी गेले. द्रोपदीला सूर्याने दिलेल्या थाळीतून अक्षय अन्न मिळत असे. मात्र तिचे जेवण झाल्यानंतर ते बंद होत असे. तेव्हा आता या सर्व ऋषींच्या भोजनाची काय व्यवस्था करावी अशा चिंतेत द्रौपदी पडली. तेव्हा तिने भगवान श्रीकृष्णांचे स्मरण केले. आठवण केल्याबरोबर भक्तवत्सल श्रीकृष्ण तात्काळ तिच्यासमोर उपस्थित झाले. द्रौपदीने सांगितलेला वृत्तांत ऐकून भगवान म्हणाले, 'त्या ऋषींच्या जेवणाचे आपण पाहू काय करायचे ते. आधी मला भूक लागली आहे! कांही तरी खायला दे.' द्रौपदीला खूप लाज वाटली. ती म्हणाली, 'अरे कृष्णा, सर्वांची जेवणे झाल्यावर मी जेवते. माझे जेवण होईपर्यंत थाळीतील अन्न अक्षय असते. पण माझे जेवण झाल्यावर मात्र थाळीत कांहीच अन्न उरत नाही.' तेव्हा द्रौपदीला खूप आग्रहाने श्रीकृष्णांनी ती थाळी आणायला लावली. त्या वेळी त्या थाळीच्या काठाशी किंचितशी भाजी लागलेली होती. ती बोटाने चाटून श्रीकृष्णाने, 'या अन्नाने विश्वात्मा भगवान प्रसन्न होवो, (*अनेन विश्वात्मा भगवान प्रीयताम्।*)' असे म्हटले. मग त्यांनी द्रौपदीला सर्व मुनींना जेवायला बोलवायला सांगितले. तेव्हा ते सगळेच अत्यंत तृप्त झाले होते.२६.

**नृणां चतुःसहस्राणि भुक्तानि स्वल्पपाकतः । जीवा अगणिता भुक्ता मायाऽतर्क्येयमीशितुः ।।२७।।**
**भास्करोऽयं प्रियो भक्तो यत्प्रसादोऽस्य नान्यके । त्रिमासं सर्वदा तेन पादसंवाहनादिभिः ।।२८।।**
**श्रद्धाभक्त्यैव भगवान् सेवितस्तत्फलं त्विदम् । इत्युक्त्वान्ये नराः प्रेम्णा तुष्टुवुः श्रीगुरुं परम् ।।२९।।**

स्वल्प+पाकतः नृणां चतुः सहस्राणि भुक्तानि, जीवाः अगणिताः भुक्ताः। इयं ईशितुः माया अतर्क्या।२७। अयं भास्करः प्रियः भक्तः यत् अस्य प्रसादः न अन्यके। तेन त्रिमासं सर्वदा पाद+संवाहनादिभिः श्रद्धा+भक्त्या एव भगवान् सेवितः इदं तत्+फलम्।' अति उक्त्वा अन्ये नराः परं श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टुवुः।२८-२९।

थोड्याशाच स्वयंपाकात चार हजार माणसे आणि अगणित जीव जेवून तृप्त झाले, ही ईश्वराची माया खरेच अतर्क्य आहे. 'अणूपेक्षांही सूक्ष्म असलेला हा परमात्मा अतर्क्य आहे,' ह्या कठोपनिषदाच्या (१:२:८) प्रतिपादनाची साक्ष इथे पटते.२७. ते लोक पुढे एकमेकांना म्हणू लागले, हा भास्कर श्रीगुरूंचा प्रिय भक्त आहे; कारण याच्यासारखा कृपाप्रसाद दुसऱ्या कुणालाही मिळाला नाही. त्याने तीन महिने श्रद्धेने आणि भक्तीने श्रीगुरुभगवंतांची पाय दाबणे इत्यादि सेवा केली त्याचेच हे फळ होय. असे बोलून दुसरे लोक प्रेमभराने श्रेष्ठ अशा श्रीगुरूंची स्तुती करू लागले.२८-२९.

श्रीगुरूंनी भास्कराला ईप्सित वर देऊन त्याच्या घरी बोळविले. पुढे तो गुरुप्रसादाने सर्व ऐहिक भोगांचा भोग घेऊन अन्ती सायुज्य मुक्ती पावला. अंत म्हणजे देहांत असा अर्थ घ्यावा किंवा सत्य आणि असत्य, द्वैत आणि अद्वैत यांची सरमिसळ भासवणाऱ्या संसाररूपी भ्रमाचा अंत असा घ्यावा. सायुज्य मुक्ती म्हणजे आत्यंतिक मोक्ष. अर्थात् निर्गुण साक्षात्कार.

**दत्वा प्रभुर्भास्करमीप्सितं वरं प्रस्थापयामास गृहाय स द्विजः ।**
**ईशप्रसादात्सकलार्थयुग्ययौ सायुज्यमन्ते दृढभक्तियोगतः ।।३०।।**

प्रभुः भास्करं ईप्सित+वरं दत्वा गृहाय प्रस्थापयामास। सः द्विजः ईश+प्रसादात् सकल+अर्थ+युक् अन्ते दृढ+भक्तितः सायुज्यं ययौ।३०।

इथे अशी शंका येऊ शकते की, श्रीगुरू हे साक्षात् ईश्वराचेच अवतार असले तरी ते साकार असल्याने सगुणच आहेत. मग सगुणाच्या उपासनेने निर्गुण साक्षात्काररूपी आत्यंतिक मोक्ष कसा होईल? याविषयी अमलानंद कल्पतरूंत लिहितात - *निर्विशेषं परं ब्रह्म साक्षात्कर्तुमनीश्वराः। ये मन्दास्तेऽनुकम्प्यन्ते सविशेषनिरूपणैः।। वशीकृते मनस्तेषां सगुणब्रह्मशीलनात्। तदेवाविर्भवेत्साक्षादपेतोपाधिकल्पनम्।।* निर्गुण परब्रह्माचा साक्षात्कार करण्याला असमर्थ अशा मंदबुद्धीच्या साधकांवर दया करून श्रुतिमाउलीने सगुण ब्रह्माचे निरूपण केले आहे. सगुणब्रह्माच्या परिशीलनाने त्यांनी मनाला वश केल्यावर सहजच उपाधिरहित (निर्गुण) ब्रह्म प्रकट होते. ब्रह्म शब्द 'बृह' धातूपासून झाला आहे. वृद्ध (विस्तृत) वस्तू असा त्याचा अर्थ आहे. ही वृद्धी निरतिशय (unqualified) आहे. कारण त्याला कुठलेच संकोचक (limiting) उपपद वाचक वगैरे लावलेले नाही. '*अथातो ब्रह्मजिज्ञासा*' या सूत्राच्या भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे निरतिशय वृद्ध (वाढलेला, वाढणारा) या बृह धातूच्या अर्थांतूनच नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान हे अर्थ प्रतीत होतात. तेच ब्रह्म श्रीगुरू नृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांच्या रूपाने अवतलेले आहे हे आपण आठव्या अध्यायात पाहिलेच आहे. सायुज्य म्हणजेच आत्यंतिक मोक्ष हा केवळ भगवत्प्रसादानेच लाभतो हे पुनःपुनः सांगितले आहे.३०.

**शृण्वन्यदप्यद्भुतमीशचेष्टितं गङ्गाह्वया तत्र तु षष्टिवत्सरा ।**
**साध्वी वशानर्च परमेशमन्वहं भक्त्यैकदोचे स तु तां किमिच्छसि ।।३१।।**

**।। गङ्गोवाच ।।**

**लोकोऽपुत्रस्य न स्वःस्था लुप्तपिण्डोदकक्रियाः । पितरोऽधः पतन्तीति श्रुत्वा स्वामिन् बिभेम्यहम् ।।३२।।**
**भवेऽग्रे सुपुत्राप्त्या गतिर्भूयादितीच्छया । सर्वेश तेऽर्चनं कुर्वे पाहि मां करुणानिधे ।।३३।।**

अन्यत् अद्भुतं ईश+चेष्टितं शृणु। तत्र तु गङ्गा+आह्वया षष्टि+वत्सरा वशा साध्वी अनु+अहं भक्त्या परम+ईशं आनर्च। एकदा सः तु तां ऊचे, 'किं इच्छसि?'३१। गङ्गा उवाच। 'अपुत्रस्य लोकः न। (हे) स्वामिन्, स्वः+स्थाः पितरः लुप्त+पिंड+उदक+क्रियाः अधः पतन्ति इति श्रुत्वा अहं बिभेमि।३२। (हे) सर्वेश, (हे) करुणा+निधे, अग्रे भवे सु+पुत्र+आप्त्या गतिः भवेत् इति इच्छया ते अर्चनं कुर्वे।३३।

साक्षात् ईश्वरस्वरूप सद्गुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक! तिथे गाणगापुरात एक गंगा नावाची साठ वर्षांची वंध्या सती रोज न चुकता येऊन अत्यंत भक्तीपूर्वक श्रीगुरू परमेश्वरांची पूजा करीत असे. एकदा त्यानी तिला विचारले, 'तुझी काय इच्छा आहे?'३१. गंगा उत्तरली, 'ऐतरेय ब्राह्मणांत (७:३:१) अपुत्राला (पर)लोक लाभत नाही असे म्हटले आहे. स्वर्गातही गेलेल्या पितरांचा, श्राद्ध आणि तर्पणाचा लोप झाल्याने अधःपात होतो असे वेदवचन ऐकून मला भीती वाटते.'३२. 'हे सर्वेश्वरा, दयासागरा, ह्या जन्मात नाही तरी निदान पुढच्या जन्मात सुपुत्राचा लाभ होऊन सद्गती मिळावी ह्याच इच्छेने मी आपले पूजन करते.'३३.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**कमावर्तेन मायाब्धौ क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम् । क्वेयं तत्र स्मृतिस्तेऽत्र पुत्रौ गङ्गे भविष्यतः ॥३४॥**
**तच्छ्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वोचे पुत्रवत्यहो । निष्कला जातिवन्ध्यापि भवेयं त्वत्प्रसादतः ॥३५॥**
**व्रततीर्थार्चने यातं वयो मे पुत्रकामया । विशेषात्सेवितोऽश्वत्थो मौर्ख्याद्दास्यति किं स मे ॥३६॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**ब्रह्मनारदसंवादं शृण्वात्थ यदसत्तु तत् । नारदाश्वत्थमूलेऽहं मध्येऽजोऽग्रे शिवः पुनः ॥३७॥**

श्रीगुरुः उवाच। 'माया+अब्धौ कर्म+आवर्तनेन क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम्? ते तत्र इयं स्मृतिः क्व? गङ्गे अत्र पुत्रौ भविष्यतः।'३४। तत् श्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वा (सा) ऊचे। अहो निष्कला जाति+वन्ध्या अपि त्वत्+प्रसादात् पुत्रवती भवेयम्।३५। 'मे पुत्र+कामया वयः व्रत+तीर्थ+अर्चने यातम्। विशेषतः मौर्ख्यात् अश्वत्थः सेवितः। स मे किं दास्यति?'३६। श्रीगुरुः उवाच। 'यत् आत्थ तत् असत्। ब्रह्म+नारद+संवादं शृणु।' '(हे) नारद, अश्वत्थ+मूले अहं, मध्ये अजः अग्रे शिवः।३७।

श्रीगुरू तिला म्हणाले, 'या मायेच्या सागरांतील कर्माच्या चक्रात तू कुठे कुठे फिरणार आहेस हे तू जाणतेस काय? त्या जन्मात जरी तुला पुत्रप्राप्ती झाली तरी ती माझीच कृपा आहे ही आठवण तुला राहील का? ऐक गंगे, याच जन्मात तुला दोन (एक कन्या आणि एक) पुत्र होतील.'३४. ते ऐकून गंगेने पदराला गाठ मारली आणि म्हणाली, 'मी जन्मतःच वंध्या आहे आणि आतां तर मला ऋतूही येत नाही. तरी आपल्या प्रसादाने मी पुत्रवती होईन असा विश्वास वाटतो.'३५.

**अवाक्प्रत्यगुदक्शाखास् त्रयाणां प्राक्समाः सुराः । तीर्थाब्धयश्चाङ्कुरेषु गोयज्ञर्षिश्रुतिद्विजाः ।।३८।।**
**ॐकारोऽङ्घ्र्यन्तशीर्षस्थ इत्यश्वत्थोऽस्त्यसंस्कृतः ।**
**नार्च्यः संस्कृत्य मौञ्ज्युक्त-कालेऽस्मिन्सत्क्षणेऽर्चयेत् ।।३९।।**

पुनः त्रयाणां अवाक्, प्रत्यक्, उदक् शाखाः। प्राक् समाः सुराः। अङ्कुरेषु तीर्थ+अब्धयः च गो+यज्ञ+ऋषि+श्रुति+द्विजाः।३८। ॐकारः अङ्घ्रि+ अन्त+शीर्ष+स्थः। इति अश्वत्थः अस्ति। असंस्कृतः न अर्च्यः। अस्मिन् मौञ्जी+उक्त+काले संस्कृत्य सत्+क्षणे अर्चयेत्।३९।

'मी पुत्रप्राप्तीच्या इच्छेने व्रत, तीर्थे आणि पूजा करण्यात सगळे आयुष्य घालविले. विशेषतः अश्वत्थाची (पिंपळाची) पूजा-प्रदक्षिणादि सेवा केली. तो पिंपळ मला अभागिनीला काय पुत्र देणार?'३६. श्रीगुरू तिला म्हणाले, 'अश्वत्थाला तू बोल लावतेस तो खरा नाही. '*अश्वत्थः सर्ववृक्षाणां*' असे भगवंत गीतेत (१०:२६) सांगतात. अश्वत्थाचे (पिपंळाचे) माहात्म्य विशद करणारा नारद आणि ब्रह्मदेव यांचा संवाद तू ऐक. 'नारदाने प्रश्न केल्यावर ब्रह्मदेवांनी त्याला सांगितले, 'नारदा, अश्वत्थाच्या मुळाशी मी स्वतः, मध्ये विष्णू आणि शेंड्यावर शंकर वास करतो.३७. तसेच त्याच्या दक्षिण, पश्चिम आणि उत्तर शाखांवरही त्याच क्रमाने आम्ही वसतो. पूर्व शाखेवर सर्व देवता राहतात. आणि त्याच्या पालवीत सर्व तीर्थे, सागर, गोमाता, यज्ञ, ऋषी, वेद आणि ब्राह्मण वसतात.३८. ॐकाराच्या अ, उ आणि म या मात्रा त्याच्या मूळ, मध्य आणि टोकाशी, ऋक्, यजुः, साम या वेदांसहित तसेच भूः, भुवः, स्वः या लोकांसहित वास करतात. असा हा अश्वत्थ वृक्ष आहे. अश्वत्थाचे पूजन त्याची मुंज केल्याशिवाय करू नये. विहित काळी त्याची मुंज केल्यावर चांगला मुहूर्त पाहून पूजा करावी.'३९.

**नार्कारशुक्रनिट्सन्ध्या-कुयुक्पर्वादिषु स्पृशेत् । वर्णित्वमौनसत्त्वाढ्यो भजेन्नामुं वधूरपि ।।४०।।**
**तत्तले गोविशा लिप्ते रञ्जिते स्वस्ति वाचयेत् । संस्नाप्य सप्तकलशैः पूजयेत्स्वाधिकारतः ।।४१।।**
**ध्यात्वाष्टबाहुं श्रीविष्णु-रूपमावेष्ट्य वाससा । नाममन्त्रैर्मंदगत्या शक्त्या कार्याः प्रदक्षिणाः ।।४२।।**
**नमेत्प्रदक्षिणायास्तु भक्त्याद्यन्तसमाप्तिषु । पदे पदे मेधफलं दैन्यर्णार्त्यघतापहृत् ।।४३।।**
**ग्रहार्तिघ्नं सौरिवारे तन्नामोच्चारणं तरोः । सदेशेऽपैति नुः काल-मृत्यू रौद्रमनोर्जपात् ।।४४।।**

अर्क, आर, शुक्र, निट्, सन्ध्या, कुयुक्+पर्व आदिषु न स्पृशेत्। वर्णित्व+मौन+सत्त्व+आढ्यो अमुं ना, वधूः अपि भजेत्।४०। तत् तले गो+विशा लिप्ते स्वस्ति वाचयेत्। सप्त+कलशैः संस्नाप्य स्व+अधिकारतः पूजयेत्।।४१।। अष्ट+बाहुं श्रीविष्णु+रूपं ध्यात्वा वाससा आवेष्ट्य मन्द+गत्या शक्त्या प्रदक्षिणाः कार्या।४२। प्रदक्षिणायाः आदि+अन्त+समाप्तिषु भक्त्या नमेत्। पदे पदे मेध+फलं दैन्य+ऋण+आर्ति+अघ+ताप+हृत्।४३। सौरि+वारे तत्+नाम+उच्चारणं ग्रह+आर्ति+घ्नम्। तरोः सदेशे रौद्र+मनोः जपात् नुः काल+मृत्यू अपैति।४४।

रविवार, मंगळवार, शुक्रवार, रात्री, सायंकाळी अशुभ योगी वा पर्वकाळी अश्वत्थाला स्पर्श करू नये. ब्रह्मचर्य, मौन, सत्यवचन आदि नियम पाळून ह्याला पुरुषाने आणि स्त्रीनेही पुजावे.४०. अश्वत्थाच्या खाली गोमयाने सारवावे. प्रथम स्वस्तिवाचन करावे; मग सात कलशांनी त्याला स्नान घालावे आणि आपल्या स्त्री, पुरुष, वर्ण आदि अधिकारानुसार पूजा करावी.४१. श्रीविष्णूंच्या अष्टभुज रूपाचे ध्यान करावे. अश्वत्थाला वस्त्राने वेढावे. मग विष्णुसहस्रनामातील प्रत्येक नामाच्या चतुर्थ्यंत रूपाने जप करीत हळूहळू शक्त्यनुसार प्रदक्षिणा कराव्यात.४२. प्रदक्षिणेच्या सुरुवातीला, मध्यभागी आणि शेवटी भक्तीपूर्वक नमस्कार करावा. प्रदक्षिणेच्या पावलागणिक अश्वमेधाचे फळ मिळते. नामोच्चारणाने दैन्य, ऋण, पीडा, पाप आणि (आध्यात्मिकादि) ताप दूर होतात.४३. शनिवारी पिंपळाची प्रदक्षिणा करीत शनीच्या नावाचा उच्चार केल्याने ग्रहांची बाधा दूर होते. (*'कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोऽन्तको यमः। सौरिः शनैश्चरो मन्दो पिप्पलादेन संस्तुतः।।'* शनैश्चरस्तोत्र १४)४४.

**तत्रातिफलदा ब्रह्म-भुज्याप्लुतिजपाध्वराः । पुत्रादिकामसिद्ध्यै नो विलम्बोऽक्षय्यपुण्यदात् ।।४५।।**
**येनेह स्थापितोऽश्वत्थस्तेन स्वः स्थापितं कुलम् । येन च्छिन्नोऽपि वंशः स्वस्तेन च्छिन्नो न संशयः ।।४६।।**
**प्रदक्षिणादशांशेन हवनं तद्दशांशतः । कृत्वा ब्रह्मभुजिं दद्याद्धैमाश्वत्थार्थगोतिलान् ।।४७।।**
**सद्ब्रह्मभ्यो लभेदिष्टमित्यूचे नारदं विधिः । तस्मात्तं विधिना साध्वी भज द्राक्सिद्धिदोऽस्ति सः ।।४८।।**

तत्र ब्रह्म+भुजि+आप्लुति+अध्वराः अति+फलदाः। अक्षय्य+पुण्य+दात् पुत्र+आदि+काम+सिद्ध्यै नो विलम्बः।४५। येन इह अश्वत्थः स्थापितः तेन स्वः कुलं स्थापितम्। येन छिन्नः तेन अपि स्वः वंशः छिन्नः न संशयः।४६। प्रदक्षिणा+दश+अंशेन हवनं, तत् दशांशतः ब्रह्म+भुजिं कृत्वा हैम+अश्वत्थ+अर्थ+गो+तिलान् सत्+ब्रह्मेभ्यः दद्यात्। इष्टं लभेत। इति विधिः नारदं ऊचे। तस्मात् (हे) साध्वी, तं विधिना भज। सः द्राक् सिद्धिदः अस्ति।४७-४८।

अश्वत्थाच्या जवळ मृत्युंजय ('*त्र्यंबकं यजामहे*') मंत्राचा जप केला असता कालमृत्यूही टाळता येतो. मग अपमृत्यूची काय कथा? अश्वत्थाखाली ब्राह्मणभोजन, स्नान, जप, यज्ञ हे केले असता अधिक फळ मिळते. अक्षय्य पुण्य देणाऱ्या अश्वत्थाच्या सेवेने पुत्रादि इच्छांची पूर्ती होण्यास विलंब लागत नाही.४५.

ज्याने या भूलोकांत पिंपळ लावला त्याने आपला वंशच स्थिर केला; आणि ज्याने पिंपळाचे झाड तोडले त्याने जणू आपलाच वंशच्छेद केला.४६. व्रताच्या सांगतेसाठी उद्यापन सांगितले आहे. प्रदक्षिणेच्या दशांश हवन आणि त्याच्या दशांश ब्राह्मणभोजन करून सोन्याचा पिंपळ, गाय दक्षिणा आणि तीळ यांचे सात्त्विक आणि विद्वान् ब्राह्मणाला दान करावे. असे ब्रह्मदेवाने नारदांना सांगितले. असा संवादाचा समारोप करून श्रीगुरू गंगेला म्हणतात, 'याकरिता हे सती, त्या पिंपळाची तूं पूजा कर. तो शीघ्र सिद्धिदायक आहे.'४७-४८.

**त्वं भीमामरजायोगे स्नात्वा षट्कूल उत्तमम् । संगमस्थं भजाश्वत्थं सत्यं पुत्रौ भविष्यतः ।।४९।।**
**तथा कुर्वेऽपि षष्ट्यब्दा मत्वोक्तिं तव वेदवत् । इत्युक्त्वा सेश्वराश्वत्थं पत्या भेजे यथाविधि ।।५०।।**

'त्वं भीमा+अमरजा+योगे षट्कूले स्नात्वा सङ्गमस्थं उत्तमं अश्वत्थं भज। सत्यं पुत्रौ भविष्यति।'४९। 'तव उक्तिं वेदवत् मत्वा षष्टि+अब्दा अपि तथा कुर्वे,' इति उक्त्वा स+ईश्वर+अश्वत्थं पत्या यथाविधि भेजे।५०।

**सकाम उपासना -** इथे हे लक्षात घ्यायचे आहे की सकाम उपासना ही प्रत्यक्षतः मोक्षाला उपयुक्त नाही. तरी पण कामाने ज्यांची मने कलुषित आहेत त्यांना इच्छापूर्तीसाठी का होईना ईश्वराचे भजन घडते आणि अंतर्मुखता येऊन ईश्वरभजनाची गोडी लागते. ईश्वरभजनाच्या प्रभावाने कामबीजाचे भस्म होते. हा वस्तुशक्तीचा प्रभाव आहे. वासनेचे बीज जळून गेल्यावर ईश्वरभक्तीद्वारा अधिकार प्राप्त होतो आणि भगवंताचा कृपाप्रसाद होतो. क्षुद्रदेवतांच्या आराधनाने मिळालेल्या फळासारखे हे फळ नाशिवंत नसते. देवतामय अश्वत्थाच्या भजनाच्या उपदेशातून आणि त्याला ॐकाररूप दाखवून इथे असाही आदेश मिळतो की संसारवृक्षाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवावी. प्रपंचातही परमार्थ पाहावा असा भावार्थ.

पुढे तिला श्रीगुरूंनी सांगितले की, 'तू भीमा आणि अमरजा यांच्या संगमाच्या षट्कूलात स्नान करून संगमावरील उत्तम अशा पिंपळाची सेवा कर. खरोखर तुला एक कन्या आणि एक पुत्र होतील.' अन्नमय कोशाची ब्रह्मदृष्टीने उपासना केल्यास सर्व अन्नाची प्राप्ती होते तसेच हे फळ सांगितले आहे. आपल्या भावानुसार सिद्धी होते असा अभिप्राय.४९ 'आपले वचन वेदतुल्य मानून मी अश्वत्थाला देवतास्वरूप मानून त्याची सेवा करते' असे श्रीगुरूंना बोलून तिने आपल्या पतीसह त्या पिंपळाची आणि त्याखाली बसलेल्या सद्गुरूंची यथाविधी पूजा केली.५०.

**चतुर्थेऽह्न्याह तत्स्वप्ने कृत्वाश्वत्थप्रदक्षिणाः । यद्दास्यति गुरुर्भुङ्क्ष्व भवेत्पुत्र इति द्विजः ।।५१।।**
**साप्युत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य सद्गुरुम् । भक्त्या प्रदक्षिणीकृत्य साश्वत्थं प्रणनाम ह ।।५२।।**
**दत्त्वा फले स तां प्राह दानं देहि समाप्य सत् । व्रतं प्रदक्षिणारूपं फले भुंक्ष्वेष्टकामदे ।।५३।।**
**प्राग्युगेऽनेकपुत्राः स्युरौरसो दत्तकस्त्विह । औरसस्तूत्तमोऽस्यास्य-दर्शनं पितृमुक्तिदम् ।।५४।।**
**तत्साध्वीहौरसौ पुत्रौ तारकौ ते भविष्यतः । मदर्चनफलं त्वेतन्न सन्देहोऽत्र शोभने ।।५५।।**

अश्वत्थ+प्रदक्षिणाः कृत्वा चर्तुथे अह्नि तस्य स्वप्ने द्विजः 'यत् गुरुः दास्यति भुङ्क्ष्व' इति।५१। सा अपि उत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य, सद्गुरुं स+अश्वत्थं भक्त्या प्रदक्षिणीकृत्य प्रणनाम ह।५२। सः तां फले दत्वा प्राह। प्रदक्षिणा+रूपं सत् व्रतं समाप्य इष्ट+कामदे फले भुङ्क्ष्व।५३। 'प्राक् युगे अनेक पुत्राः स्युः, इह तु औरसः दत्तकः (च)। औरसः तु उत्तम+उत्तमः, अस्य दर्शनं पितृ+मुक्तिदम्।५४। तत् (हे) साध्वि, इह ते औरसौ तारकौ पुत्रौ भविष्यतः। (हे) शोभने, एतत् तु मत्+अर्चन+फलं अत्र न संदेहः।५५।'

तिने आरंभिलेल्या अश्वत्थसेवेच्या चौथ्या दिवशी तिच्या स्वप्नात एका ब्राह्मणाने येऊन सांगितले की, 'पिंपळाला प्रदक्षिणा घातल्यावर तुला श्रीगुरू जे देतील ते भक्षण कर.'५१. तिने सकाळी उठून स्नान केले आणि संगमावर जाऊन पिंपळासहित सद्गुरूंना भक्तीपूर्वक प्रदक्षिणा करून नमस्कार केला.५२. त्यांनी तिला दोन फळे देऊन सांगितले की, 'तुझ्या प्रदक्षिणात्मक व्रताची दान करून समाप्ती कर आणि ही फळे खा.'५३. गरुडपुराणांत 'किती प्रकारचे पुत्र असतात?' या गरुडाच्या प्रश्नाला उत्तर देताना भगवान् विष्णूंनी चौदा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत. मात्र कलियुगांत औरस आणि दत्तक हे दोनच पुत्र शास्त्रसंमत आहेत. (*औरसो दत्तकश्चैव कलौ द्वावेव संमतौ। औरसो धर्मपत्नीज..*) जिवंतपणी औरस पुत्राचे मुखदर्शन पित्याचे ऋण फेडून त्याला मुक्ती देणारे असते असे ऐतरेय ब्राह्मणाचे (७:३:१) वचन आहे. तरी हे साध्वी, तुला या जन्मीच दोन तारक औरस पुत्र (एक कन्या आणि एक पुत्र) होतील. हे शोभने, हे तू केलेल्या माझ्या अर्चनाचेच फळ आहे यांत संशय नाही.'५४-५५.

**तथेत्युक्त्वापि सा गेहं गत्वा चक्रे यथोदितम् । निष्कलाप्यृतुमत्यासीन् निःसीममहिमा प्रभोः ।।५६।।**
**शुद्धूर्ध्वं सह पत्यैत्य सा प्रपूज्य गुरुं मुदा । गृहं गत्वा दधौ गर्भं तन्निशीशप्रसादतः ।।५७।।**
**स्वतन्त्रसंविद्भगवान् लीलां को वेत्ति यत्स्तुतौ । द्विसहस्ररसज्ञोऽपि कुण्ठितश्चकिता श्रुतिः ।।५८।।**
**वलीपलितवेपैर्यद्देहो विद्धो जराकृशः । साधत्त गर्भमित्यन्ये प्रशशंसुः परस्परम् ।।५९।।**
**तद्भर्ता सोमनाथस्तु प्रीत्या पुंसवनादिकाः । क्रिया व्यधात्क्रमात्पुत्रीं कालेऽसौषीत्ततः सती ।।६०।।**

सा अपि 'तथा' इति उक्त्वा गेहं गत्वा यथा उदितं चक्रे । (सा) निष्कला अपि ऋतुमति आसीन्। प्रभोः निःसीममहिमा।५६। सा शुद्धि+ऊर्ध्वं पत्या सह एत्य मुदा गुरुं प्रपूज्य गृहं गत्वा तत् निशि ईश+प्रसादात् गर्भं दधौ।५७। यत् स्तुतौ द्वि+सहस्र+रसज्ञः अपि कुण्ठितः, श्रुतिः चकितः, स्वतन्त्र+संवित् भगवान् (तस्य) लीलां कः वेत्ति?५८। अन्ये परस्परं प्रशशंसुः, 'यत् देहः वली+पलित+वेपैः विद्धः जरा+कृशः सा गर्भं आधत्त।'५९। तत् भर्ता सोमनाथः तु प्रीत्या क्रमात् पुंसवनादिकाः क्रिया व्यधात्। ततः काले सती पुत्रीं असौषीत्।६०।

श्रीगुरूंची आज्ञा मान्य करून ती घरी गेली आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे तिने ती फळे खाल्ली. श्रीगुरूंच्या अपार महिमेने ती गतार्तवा वृद्धाही ऋतुस्नात झाली.५६. चौथ्या दिवशी स्नान करून शुद्ध झाल्यावर (*'चतुर्थेऽह्नि शुद्ध्यति.'* पराशरस्मृति ७:१७) पाचव्या दिवशी ती पतीसह श्रीगुरूंकडे येऊन आनंदाने त्यांची पूजा करून घरी गेली. भगवंताच्या कृपाप्रसादाने त्याच रात्री तिला गर्भधारणा झाली.५७. ज्याची स्तुती करता करता शेषाला दोन हजार जिभाही पुरल्या नाहीत आणि वेदही चक्रावून गेले त्या अपराधीनबुद्धी भगवंताच्या लीला कुणाला तरी कळतील का?५८. सर्व लोक आश्चर्याने परस्परांना म्हणू लागले, 'जिचा देहावर वळ्या पडलेल्या आहेत, केस पांढरे झाले, अंगाला कांप आहे, वार्धक्याने देह कृश झालेला आहे, अशा म्हातारीला गर्भ राहिला!'५९. तेव्हा गंगेच्या पतीने, सोमनाथाने हौसेने क्रमशः पुंसवनादि शास्त्रविहित गर्भाचे संस्कार केले. मग त्या सतीने यथाकाल एका मुलीला जन्म दिला.६०.

**तदेयं कन्यका साध्वी सच्छीलगुणशालिनी । भविष्यति कुलोद्धर्त्री पुत्राढ्येत्याह दैववित् ।।६१।।**
**तच्छ्रुत्वा स द्विजेभ्योऽदादर्थवस्त्रादिकं द्विजः । प्रापतुर्द्वादशेऽह्नीशं कन्यामादाय दंपति ।।६२।।**
**तत्पादाब्जान्तिकं कन्यां संस्थाप्योचे प्रणम्य सा । संसृतिस्थजरद्वन्ध्य-द्रुमस्ते फलितो दृशा ।।६३।।**

तदा दैववित् 'इयं कन्यका साध्वी, सत्+शील+गुण+शालिनी कुल+उद्धर्त्री पुत्र+आढ्या भविष्यति' इति आह।६१। तत् श्रुत्वा सः द्विजः द्विजेभ्यो अर्थ+वस्त्र+आदिकं अदात्। द्वादशे अह्नि दंपति कन्यां आदाय ईशं प्रापतुः।६२। तत्+पाद+अब्ज+अन्तिकं कन्यां संस्थाप्य प्रणम्य सा ऊचे। 'ते दृशा संसृति+स्थ+जरत्+वन्ध्य+द्रुमः ते दृशा फलितः।६३।

तेव्हा ज्योतिष्यांनी जातक वर्तविले की, 'ही कन्या साध्वी, सुशील गुणवान्, कुळाचा उद्धार करणारी आणि पुत्रवती होईल.'६१. ते भाकीत ऐकून त्या सोमनाथ ब्राह्मणाने ब्राह्मणांना दक्षिणा, वस्त्रे इत्यादि दिले. बाराव्या दिवशी ते दोघे पतिपत्नी कन्येला घेऊन श्रीगुरूंकडे आले.६२. त्यांच्या चरणकमलांच्या सन्निध त्या कन्येला ठेवून उभयतांनी नमस्कार केला आणि ती गंगा श्रीगुरूंना म्हणाली, 'अहं-ममतेने संसारात स्थिरावलेला हा वठलेला आणि वांझ देहरूपी वृक्ष आपल्या कृपाकटाक्षाने फळला आहे.'६३.

फळांनी बहरलेला वृक्षसुद्धा त्याची फळे चांगली असली तरच वाटसरू त्याला स्वीकारतात. **सुफल** म्हणजे पुत्रवान असला तरच वाटसरू म्हणजे स्वर्गलोकाची अपेक्षा असलेले पूर्वज अंगीकारतात. ऐतरेय ब्राह्मणानुसार पुत्र हा प्रकाशरूप मक्ती देणारा असतो तर पुत्री ही कष्टदायिनी असते. अर्थात् संतान होऊनही ती कन्या असेल तर मोघफलच नाही का? त्यापेक्षा वन्ध्यत्व बरे! असा तिचा अभिप्राय दिसतो. 'प्रभो, आपण जाणताच' असंही ती म्हणते आहे. पण हा अर्थ गौणपक्षी आहे असे श्रीमहाराज म्हणतात.

**सेव्यते फलितोऽपि द्रुः पान्थैश्चेत्सुफलो वरम्। वन्ध्योऽपि मोघफलत इति भातीश वेत्सि तत् ।।६४।।**

फलितः अपि द्रुः सुफलः चेत् पान्थैः सेव्यते। मोघ+फलतः वन्ध्यः अपि वरं इति भाति। (हे) ईश तत् वेत्सि।'६४।

मुख्यार्थ पुढीलप्रमाणे आहे. श्रीगुरूंच्या उपासनेने शुद्धचित्त ब्राह्मणीला कन्येच्या गर्भ वाढवण्याचे आणि प्रसूतीचे जे कष्ट झाले त्यांनीच वैराग्य उत्पन्न झाले. त्यामुळेच ह्या संततीपासून प्राप्त होणारी सुखे आणि लोक घेऊन काय करायचे? आत्मा हाच आपला नित्य आणि परमानंदस्वरूप लोक आहे असा तिचा निश्चय झाला. त्या भूमिकेतून ती बोलत आहे. **संसृतिस्थ** म्हणजे मी आणि माझे ह्या बुद्धीने संसारांत स्थिर झालेल्या, **जरत्** म्हणजे वृद्ध, पुरुषत्वाने प्राप्त होणारा कर्माधिकार नसलेली म्हणून **वंध्यः**, कर्माचरणाला अयोग्य, अर्थात् कर्मफलरहित म्हणजे वांझ **वृक्ष**, म्हणजेच पंचभूतांच्या संघातात्मक देह; तो आपल्या कृपाकटाक्षाने **फलित** झाला म्हणजे विवेक उत्पन्न झाला; तो **सुफलित** म्हणजे मोक्षर्पयवसायी झाला तरच **पान्थैः** म्हणजे मुमुक्षूंनी अंगीकारला जातो; अन्यथा **मोघफलतो** र्स्वगादिलक्षण नाशिवंत भोगांचे फल असेल तर तो त्याज्य ठरतो. त्यापेक्षा पाप-पुण्यविरहित (*वंध्यत्वं वरं*) निष्फलताच बरी. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. शंकरार्चायांनी कठोपनिषदांतील (२:३:१) '*ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख*' या मंत्रावरील भाष्यात केलेले समष्टिरूप आणि व्यष्टिरूप देहावरील रूपक दिले आहे. त्याचा भावार्थ असा -

'जन्म, जरा, मृत्यू, शोक आदि अनेक अनर्थांचा बनलेला; क्षणाक्षणाला रूप पालटणारा; माया, मृगजळ, आकाशांतील मेघांची गंधर्वनगरी यांसारख्या पाहता पाहता नष्ट होणाऱ्या स्वरूपाची; मृत्यूनंतर वृक्षाप्रमाणेच अभावात्मक; केळीच्या बुंध्यासारखा निःसार; पाखंड बुद्धीच्या शेकडो विकल्पांचे मूळ; तत्त्वाच्या जिज्ञासूंनी अनिर्धारित (अनिश्चित) 'इदं' तत्त्वस्वरूप; वेदांताने निश्चित केलेले परब्रह्म ज्याचे मूलसार (अधिष्ठान) आहे;

**तच्छ्रुत्वा सस्मितं कन्यामादायेशो जगाद तौ । शीलधीगुणपुत्राढ्या भवेत्साध्व्यखिलार्चिता ।।६५।।**

तत् श्रुत्वा ईशः सस्मितं कन्यां आदाय तौ जगाद। 'शील+धी+ गुण+पुत्र+आढ्या अखिल+अर्चिता साध्वी भवेत्।'६५।

अविद्या, काम, कर्म आणि अव्यक्त या बीजांपासून अंकुरणारा; परब्रह्मावेगळा, विज्ञान व क्रिया या शक्तिद्वयात्मक हिरण्यगर्भ ज्याचा अङ्कुर आहे; सर्व प्राणी आणि लिंगभेद या ज्याच्या फांद्या आहेत; तृष्णारूपी जलाच्या सिंचनाने ज्याला उग्र दर्प आहे; बुद्धी, इंद्रिय, विषय हेच ज्याची पालवी आहे; श्रुती, स्मृती, न्याय, विद्या, उपदेश ह्या ज्याच्या पाकळ्या आहेत; जो यज्ञ, दान, तप आदि कर्मरूपी फुलांनी बहरलेला आहे; सुख, दुःख, वेदना अशा अनेक रसांनी भरलेला; प्राण्यांच्या उपजीविकेच्या अनंत फळांनी लखडलेला; त्यांच्या तृष्णारूपी पाण्याच्या सिंचनाने ज्याच्या विस्तारलेल्या मुळ्या, एकमेकांत गुंतून जटिल आणि दृढ झाल्या आहेत; ब्रह्मादि पक्ष्यांनी सत्य आदि लोकांची घरटी ज्याच्यावर बांधली आहेत; प्राण्यांच्या सुखदुःखामुळे झालेल्या हर्ष-शोकांपासून प्रकटलेल्या नृत्य, गीत, वादन, क्रीडा, टाळ्या, हास्य, आक्रोश, रुदन, 'हा हा', 'सोड सोड' इत्यादि अनेक शब्दांच्या गदारोळाने झालेला क्षुब्धतम महाध्वनी; याचा उच्छेद केवळ वेदांतविहित ब्रह्मात्मदर्शनरूपी असंगशस्त्राने होतो.'६४. ते ऐकून श्रीगुरूंनी स्मितमुखाने त्या कन्येला उचलून घेतले आणि म्हणाले, 'ही शीलवती, बुद्धिमती, गुणवान्, पुत्रवती आणि सर्वांना पूज्य होईल.' इथे श्रीगुरूंनी आपल्या स्मिताने विवेकसंपन्न झालेल्या ब्राह्मणीवर आपली माया पसरली; कारण आधी दिलेल्या पुत्रप्राप्तीच्या आणि मुक्तीच्या वराचा अनुभव तिला द्यायचा होता.६५.

**कन्या लब्धोत्तमेयं वां पुत्रेच्छा चेद्भवेत्सुतः । मूर्खः शतायुर्वाल्पायुर्विद्वान्वां कतरः प्रियः ।।६६।।**
**सार्भो विद्वान् प्रियोऽल्पायुरपीत्यूचतुरप्युभौ । तथेत्युक्त्वा स सापत्यौ गमयामास तौ प्रभुः ।।६७।।**
**गर्भं साप्यल्पकालेन धृत्वासूत सुतं शुभम् । श्रद्धया निष्कलाप्येवं पुत्रौ लेभेऽथ किं वद ।।६८।।**
**विद्याविनयवान् भूत्वा पितृशुश्रूषणोद्यतः । धार्मिकः पञ्च पुत्रांस्तत्पुत्रो लब्ध्वामृतं ययौ ।।६९।।**
**कन्यापीशप्रसादात्सा दीक्षितस्य सती शुभा । भूत्वा गुरूक्तवद्ब्रह्म-वादिनी प्राप सद्गतिम् ।।७०।।**

'इयं उत्तमा कन्या लब्धा। वां पुत्र+इच्छा चेत् सुतः भवेत्। वां मूर्खः शतायुः, वा अल्पायुः विद्वान्, कतरः प्रियः?'।६६। 'अल्पायुः अपि स+अर्भः विद्वान् प्रियः।' इति उभौ ऊचतुः। 'तथा' इति उक्त्वा सः प्रभुः तौ स+अपत्यौ गमयामास।६७। सा अपि अल्पकालेन गर्भं धृत्वा शुभं सुतं असूत। एवं श्रद्धया निष्कला अपि पुत्रौ लेभे। अथ किं वद।६८। तत् पुत्रः धार्मिकः विद्या+विनयवान् भूत्वा पितृ+शुश्रूषण+उद्यतः पञ्च पुत्रान् लब्ध्वा अमृतं ययौ।६९। कन्या अपि ईश+प्रसादात् गुरु+उक्तवत् दीक्षितस्य शुभा सती ब्रह्मवादिनी भूत्वा सद्गतिं प्राप।७०।

'ही फार उत्तम कन्या तुम्हाला झाली. जर तुम्हाला मुलगा हवा असेल तर तोही होईल. तुम्हाला शतायुषी मूर्ख मुलगा आवडेल की अल्पायुषी पण विद्वान्?'६६. 'अल्पायुषी असला तरी आम्हाला विद्वान् आणि पुत्रवान् मुलगा आवडेल.' या त्यांच्या म्हणण्याला अनुमोदन देऊन त्या श्रीगुरूंनी त्यांची कन्येसहित पाठवणी केली.६७. 'अल्पकाळातच त्या गंगेने गर्भ धारण केला आणि छानशा मुलाला जन्म दिला. अशा रीतीने ऋतू गेलेला असतानाही श्रद्धेच्या बळावर त्या वृद्धेला दोन मुले लाभली. नामधारका, यापेक्षा श्रीगुरूंचे अधिक माहात्म्य काय सांगावे?'६८. त्यांचा तो मुलगा अत्यंत धार्मिक, विद्यावान् आणि विनयशील झाला. तो आईवडिलांच्या सेवेत तत्पर होता. त्याला पाच मुलगे झाल्यावर तो सद्गती पावला.६९. त्यांची ती गुणी कन्यासुद्धा श्रीगुरूंनी सांगितल्याप्रमाणे दीक्षिताची पत्नी आणि ब्रह्मवादिनी होऊन पतीसह सद्गती पावली. स्त्रियांना वेदपठणाचा अधिकार नसताना ती ब्रह्मवादिनी कशी झाली? या प्रश्नाचे उत्तर असे - उपनयनाभावी सांगशाखा वेदाच्या अध्ययनाचा अधिकार नसला, तरी दीक्षिताच्या पत्नीला मंत्रपाठ आणि श्रवणाचा अधिकार आहे.७०.

**एवं गुरुप्रभावोऽयं श्रद्धादृष्ट्यैव दृश्यते । सद्भक्तैर्न त्वभक्तैः स जन्मान्धैरिव भास्करः ।।७१।।**
**दण्डकुण्डीकरं शान्तं काषायाच्छादनं सदा । ध्यायन्तौ यतिरूपं तं दम्पती मुक्तिमापतुः ।।७२।।**
**श्रद्धाभक्त्यैव सुलभा गुरुवाक्यानुवर्तिनाम् । उभयी सिद्धिरप्यन्यच्चित्रं तच्चेष्टितं शृणु ।।७३।।**
**तत्रैत्य नरहर्याख्यो विप्रः कुष्ठी जगद्गुरुम् । प्रणतः शरणं प्राप्य प्रावोचद् गद्गदाक्षरः ।।७४।।**
**हरे शम्भो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत । भक्तवत्सल ते कीर्तिं श्रुत्वात्राप्तोऽस्मि सद्गुरो ।।७५।।**

एवं गुरु+प्रभावः। अयं श्रद्धा+दृष्ट्या एव सत्+भक्तैः दृश्यते। सः तु न अभक्तैः (दृश्यते) जन्मांधैः भास्कर इव।७१। दण्ड+कुण्डी+करं शान्तं काषाय+आच्छादनं यतिरूपं तं सदा ध्यायन्तं दम्पती मुक्तिं आपतुः।७२। गुरु+वाक्य+अनुवर्तिनां श्रद्धा+भक्त्या एव उभयी सिद्धिः सुलभा। अन्यत् अपि चित्रं तत् चेष्टितं शृणु।७३। तत्र नरहरि+आख्यः कुष्ठी विप्रः एत्य जगत्+गुरुं प्रणतं शरणं प्राप्य गद्गद+अक्षरः प्रावोचत्।७४। '(हे) हरे, शम्भो, परानन्द+मूर्ते, अच्युत, भक्त+वत्सल, सद्गुरो, जय, जय। ते कीर्तिं श्रुत्वा अत्र आप्तः अस्मि।'७५।

असा हा श्रीगुरूंचा प्रभाव आहे. मात्र श्रद्धारूपी दृष्टी असलेल्या सद्भक्तांनाच तो दिसतो. जन्मांधाला जसा सूर्य दिसत नाही, तसा अभक्तांना सद्गुरुमहिमा दिसत नाही. **श्रद्धा म्हणजे गुरू आणि शास्त्र यांनी उपदेशिलेल्या तत्त्वांवर आणि त्यांच्या प्राप्तीच्या उपायांवर परम विश्वास**.७१. एका हातात दंड आणि एका हातात कमंडलु धारण केलेल्या, भगवी छाटी पांघरलेल्या त्या यतिरूप सद्गुरूंचे निरंतर ध्यान करीत ते सोमनाथ आणि गंगा हे जोडपे मुक्त झाले.७२. गुरुवाक्याला अनुसरणाऱ्यांना श्रद्धायुक्त भक्तीनेच ऐहिक आणि पारलौकिक अशी दुहेरी सिद्धी सुलभ असते. आता श्रीगुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक.७३. तिथे गाणगापुरी एक नरहरी नावाचा कुष्ठी ब्राह्मण आला. त्याने सद्गुरूंना शरण जाऊन त्यांना साष्टांग नमस्कार केला आणि गहिवरलेल्या कंठाने आपली हकीकत सांगितली.७४. सद्गुरूंना लावलेली संबोधने हेतुगर्भ आहेत. हरी म्हणजे पाप हरण करणारा. शंभू म्हणजे आरोग्य देणारा. तसेच परानंदमूर्ती म्हणजे मोक्षदाता. भक्तवत्सल या नावाने त्यांच्या कृपेला आवाहन केले आहे. नरहरी म्हणतो, 'सद्गुरुमहाराज मी आपली कीर्ती ऐकून इथे आलो आहे.'७५.

**यजुर्विदोऽपि मे तुण्डं केऽपि नेक्षन्ति कुष्ठिनः । तीर्थार्चनजपैः कुष्ठं तन्मे नापैत्यघात्मनः ॥७६॥**
**कृपया तेऽपयायात् तदिति मत्वागतोऽस्म्यहम् । नास्ति चेत्तत्प्रतीकारः शंसाग्रेऽसूंस्त्यजामि ते ॥७७॥**
**तच्छ्रुत्वा प्राक्तनाघोत्थं कुष्ठं नश्येदिति प्रभुः । प्रोक्त्वा शुष्कौदुम्बरैधो दृष्ट्वावोचत्सकुष्ठिनम् ॥७८॥**
**मद्वाक्ये भक्तिमांश्चेत् तत्काष्ठमारोप्य सङ्गमे । भज पल्लविते तस्मिन्छुद्धोऽकुष्ठो भविष्यसि ॥७९॥**
**ओमित्युक्त्वा तदारोप्य श्रद्धाभक्त्या स सङ्गमे । भेजे दत्वाधारबन्धं परितोऽम्बुनिषेचनैः ॥८०॥**

'यजुः+विदः अपि मे कुष्ठिनः के अपि तुण्डं न पश्यति। मे अघ+आत्मनः तत् कुष्ठं न अपैति।'७६। 'ते कृपया तत् अपयायात् इति मत्वा अहं आगतः अस्मि। तत् प्रतीकारः नास्ति चेत् शंस, ते अग्रे असून् त्यजामि।'७७। तत् श्रुत्वा प्रभुः 'प्राक्तन+अघ+उत्थं कुष्ठं नश्येत्' इति प्रोक्त्वा शुष्क+औदुम्बर+एधः दृष्ट्वा सः कुष्ठिनं अवोचत्।७८। 'मत्+वाक्ये भक्तिमान् चेत् तत् काष्ठ सङ्गमे आरोप्य भज। तस्मिन् पल्लविते शुद्धः अकुष्ठः भविष्यसि।'७९। 'ॐ' इति उक्त्वा सः श्रद्धा+भक्त्या तत् सङ्गमे आरोप्य, आधार+बन्धं दत्वा, परितः अम्बु+निषेचनैः भेजे।८०।

'मी यजुर्वेद जाणणारा ब्राह्मण असूनही कुष्ठी म्हणून कुणी माझे तोंडसुद्धा पाहात नाहीत. ते कुष्ठ घालविण्यासाठी तीर्थयात्रा, अनेक देवांच्या पूजा आणि जपादिक खूप प्रयत्न केले. पण माझ्या पापाविष्ट देहाची शुद्धी होत नाही.'७६. 'आपल्या कृपेने त्याचा परिहार होईल अशा आशेने मी आलो आहे. जर त्याचा कांही प्रतिकारच नसेल तर तसे सांगा, मी इथेच आपल्या समोर प्रायोपवेशनाने प्राणत्याग करतो.'७७. त्याचे ते बोलणे ऐकून श्रीगुरू म्हणाले, 'पूर्वकर्मांच्या पापामुळे उद्भवलेले हे कुष्ठ नष्ट होईल.' समोर एक औदुंबराचे वाळलेले लाकूड पाहून ते त्या कुष्ठग्रस्ताला म्हणाले.७८. 'माझ्या वाक्यावर तुझी श्रद्धा असेल तर हे लाकूड घेऊन संगमावर लाव आणि त्याला पाणी घालणे इत्यादी सेवा कर. त्या लाकडाला पालवी फुटली की तू शुद्ध होशील आणि तुझे कुष्ठ नाहीसे होईल.'७९. 'ॐ' असे म्हणून ते मान्य करीत त्याने ते वाळलेले लाकूड संगमावर नेऊन तिथे त्याचे आरोपण केले, त्याला आधार देऊन व आळे करून त्याला पाणी घालून त्याची श्रद्धा व भक्तीपूर्वक उपवास करीत सेवा आरंभली.८०.

**कृपाऽस्य सद्यस्तव शुद्ध्यभावादुक्तं फलं कष्टमिदं कुतोऽस्मिन् ।**
**शंकाकुरस्यात इदं त्यजेति जनैर्निषिद्धोऽप्यभजत्सदेध्मम् ।।८१।।**
**तदैत्य ते गुरुं प्राहुर्भवद्वाक्याद्द्विजो जरत् । भजतीध्मं बोधय तं मरिष्यत्युपवासतः।।८२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**करोति साधु तद्विप्रो दृढभक्त्या तरिष्यति । भक्तिर्हि तारकात्रैव भवसिन्धुनिमज्जतः ।।८३।।**
**मन्त्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भि(भे)षजे गुरौ । यादृशी भावना यस्य तस्य सिद्धिस्तु तादृशी ।।८४।।**

'अस्य कृपा सद्यः। तव शुद्धि+अभावात् इदं कष्टं फलं उक्तम्। अस्मिन् अङ्कुरस्य शङ्का कुतः? इदं त्यज।' इति जनैः निषिद्धः अपि (द्विजः) सदा इध्मं अभजत्।८१। तदा ते गुरुं एत्य प्राहुः, 'भवत् वाक्यात् द्विजः जरत् इध्मं भजति। तं बोधय। (अन्यथा) उपवासतः मरिष्यति।'८२। श्रीगुरुः उवाच। तत् विप्रः साधु करोति। दृढ भक्त्या तरिष्यति। अत्र भव+सिन्धु+निमज्जतः भक्तिः एव तारका हि।८३। मन्त्रे, तीर्थे, द्विजे, देवे, दैवज्ञे, भिषजे, गुरौ यस्य यादृशी भावना तस्य तु तादृशी सिद्धिः।८४।

त्याने चालवलेली ती काष्ठसेवा पाहून त्याची दया येऊन कांही लोक त्याला म्हणाले, 'आमच्या श्रीगुरूंची दर्शनमात्रे कृपा होते. तुझ्या पापाला निष्कृती नसेल म्हणून हे कष्टरूपी पापनाशक फळ तुला सांगितले आहे. या वाळून कोळ झालेल्या लाकडाला अंकुर फुटण्याची शंका तरी आहे का? तू हा व्यर्थ खटाटोप सोड.' लोकांनी अनेक वेळा समजावूनही तो ब्राह्मण मात्र त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्या काष्ठाची सेवा करीत राहिला.८१. तेव्हा ते लोक श्रीगुरूंकडे गेले आणि म्हणाले, 'आपल्या वचनानुसार तो कुष्ठी ब्राह्मण खरोखरच ते वाळलेले लाकूड रोपून त्याला पाणी घालतो आहे. त्याला आपणच समजावून सांगा. नाहीतर उपवासांनी तो मरायचा!'८२. श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'तो ब्राह्मण उत्तमच करतो आहे. त्याच्या ह्या दृढ भक्तीने तो तरून जाईल. जितका भाव दृढ असेल तितकेच फलही निश्चित मिळते. ह्या भूलोकात संसारसागरात बुडणाऱ्याला भक्तीच खरोखर तारून नेते. मंत्र, तीर्थ, ब्राह्मण, देव, ज्योतिषी, वैद्य (किंवा औषध) तसेच गुरू यांच्याविषयी ज्याची जशी भावना असेल त्याप्रमाणेच फळ मिळते.'८४.

**वच्मि सूतर्षिसंवादं प्राग्वृत्तं दृढभक्तिदम् । ऋषीन्सूतो जगादेदं सिंहकेतुनृपात्मजः ॥८५॥**
**धनञ्जयाख्यः पाञ्चाल एकदा वनमभ्यगात् । दृष्ट्वा स मृगयाश्रान्तस् तत्र जीर्णं शिवालयम् ॥८६॥**
**तस्थौ तत्र क्षणं साकं शबरेणानुयायिना । दृष्ट्वा लिङ्गानि रम्याणि दूतः प्राह नृपं गृहे ॥८७॥**
**लिङ्गं नीत्वा पूजयितुं कांक्षेऽज्ञोऽस्म्यनुशाधि माम् । यदाज्ञापयसे देव दृढभक्त्या करोमि तत् ॥८८॥**

**॥ राजपुत्र उवाच ॥**

**संस्थाप्य सत्स्थले लिङ्गं शुचिर्भूत्वा स्त्रियान्वितः । भक्त्या पूजय मत्वेशमुपचारैर्यथाविधि ॥८९॥**

दृढभक्तिदं प्राक् वृत्तं सूत+ऋषि+संवादं वच्मि। सूतः ऋषीन् इदं जगाद। पाञ्चाले सिंहकेतु+नृप+आत्मजः धनंजय+आख्यः एकदा वनं अभ्यगात्। तत्र सः मृगया श्रान्तः जीर्णं शिव+आलयं दृष्ट्वा तत्र शबरेण अनुयायिना साकं क्षणं तस्थौ। दूतः रम्याणि लिङ्गानि दृष्ट्वा नृपं प्राह। 'लिङ्गं गृहे नीत्वा पूजयितुं काङ्क्षे। अज्ञः अस्मि। मां अनुशाधि। (हे) देव यत् आज्ञापयसे तत् दृढभक्त्या करोमि।'८५-८८। राजपुत्र उवाच। 'लिङ्गं सत्स्थले संस्थाप्य शुचिः भूत्वा स्त्रिया+अन्वितः ईशं मत्वा भक्त्या यथाविधि उपचारैः पूजय।'८९।

श्रीगुरू त्या लोकांना पुढे म्हणतात, 'पूर्वीची एक घडलेली गोष्ट सूत आणि शौनकादि ऋषींच्या संवादरूप तुम्हाला सांगतो. सूतांनी ऋषींना सांगितले. पांचाल देशात सिंहकेतू राजाचा धनंजय नावाचा मुलगा वनात शिकारीसाठी गेला होता. मार्गात थकल्यामुळे तो आपल्या बरोबर असलेल्या भिल्ल चाकरासह एका जुन्या शिवमंदिराजवळ किंचित् काळ थांबला. त्या भिल्ल नोकराने तिथे पडलेली अनेक सुंदर लिंगे पाहिली आणि तो राजपुत्राला म्हणाला, 'महाराज यातील एखादे लिंग नेऊन घरी त्याची पूजा करावी अशी मला इच्छा होत आहे. पण मी अज्ञानी आहे. पूजा कशी करायची वगैरे मला माहीत नाही. गुरुदेवा, आपणच मला उपदेश करावा. आपण जशी आज्ञा कराल तसे मी सर्व दृढ भक्तीने करीन.'८८. राजपुत्राने त्याला सांगितले, 'ते लिंग चांगल्या पवित्र स्थळी ठेवावे. स्नानादींनी शुद्ध होऊन स्त्रीसह ते लिंग म्हणजे प्रत्यक्ष भगवान् शंकर आहेत अशी भावना करून भक्तीपूर्वक यथाविधी उपचारांनी पूजा करावी.'८९.

**चिताभस्मान्वहं देयं दत्तान्नं भुङ्क्ष्व भार्यया । प्रसादबुद्ध्येत्युक्त्वा स पूजाविधिमुपादिशत् ।।९०।।**
**सोऽपि तुष्टो गृहीत्वैकं लिङ्गं गत्वा गृहं स्त्रिया । भेजे यथोपदेशं तद् भस्मादात्प्रत्यहं मुदा ।।९१।।**
**भस्मैकस्मिन्दिने क्वापि न लेभेऽभूत्स दुर्मनाः । तद्भार्या प्राह मां दग्ध्वा शम्भवेऽर्पय भस्म तत् ।।९२।।**
**शरीरं कृमिविड्भस्म-रूपान्तं क्षणभङ्गुरम् । तत्साफल्यं कुरु हरे भस्मार्पणनिमित्ततः ।।९३।।**

'अनु+अहं चिता+भस्मं देयम्। दत्त+अन्नं प्रसाद+बुद्ध्या भार्यया भुङ्क्ष्व।' इति उक्त्वा सः पूजाविधिं उपादिशत्। ९०। सः अपि तुष्टः लिङ्गं गृहीत्वा गृहं गत्वा तत् स्त्रिया यथा+उपदेशं भेजे। प्रति अहं मुदा भस्म अदात्।९१। एकस्मिन् दिने क्व अपि भस्म न लेभे। सः दुर्मनाः अभूत्। तत्+भार्या प्राह, 'मां दग्ध्वा तत् भस्म शम्भवे अर्पय।'९२। कृमि+विट्+भस्म+रूप+अन्तं क्षणभङ्गुरं शरीरं हरे भस्म+अर्पण+निमित्ततः तत् साफल्यं कुरु।

'रोज त्याला चिताभस्म द्यावे. त्याला नैवेद्य दाखविलेले अन्न प्रसाद मानून पत्नीसह भक्षण करावा.' असे सांगून राजपुत्राने त्याला पूजेचा विधी समजावून सांगितला.९०. तो शबर प्रसन्न चित्ताने लिंग घेऊन घरी गेला आणि राजपुत्राच्या उपदेशानुसार स्त्रीसह त्याची पूजा करू लागला. रोज आनंदाने तो लिंगासाठी चिताभस्म आणीत असे. एके दिवशी खूप शोधूनही कुठेच चिताभस्म मिळाले नाही. तेव्हा तो अत्यंत खिन्न झालेला पाहून त्याची पत्नी म्हणाली, 'तुम्ही मलाच जाळून ते भस्म भगवान् शंकरांना अर्पण करा.'९२. 'हया क्षणभंगूर नाशिवंत शरीराचे शेवटी कृमी, विष्ठा, भस्म यांच्यातच परिवर्तन होणार आहे. शिवाला भस्म देण्यासाठी याचा विनियोग करून त्याचे साफल्य करा.'९३.

|| शबर उवाच ||

**तिष्ठत्स्विनक्ष्माग्निषु साक्षिषु प्रिये भर्तृत्वमाश्रुत्य वृतास्यदोऽन्यथा ।**
**कुर्यां कथं तन्वि किशोरि बालिके भो साध्व्यलब्धैहिकसौख्य उत्तमे ।।९४।।**
**सा प्राह मोहो वितथोऽयमध्रुवे येन ध्रुवं साहजिकं प्रसाध्यते ।**
**तत्साधयास्मिन्परकीयकल्पना नास्त्येव तेऽर्धाङ्गविभाग्यदो वपुः ।।९५।।**
**प्रोक्ते सुयुक्ते प्रियया तथेत्यसौ प्रोक्त्वा गृहे तामवरुद्ध्य सालयाम् ।**
**दग्ध्वार्पयद्भस्म शिवाय नित्यवद् भ्रान्त्या प्रसादक्षण आह्वयत्प्रियाम् ।।९६।।**

'(हे) प्रिये इन+क्ष्मा+अग्निषु तिष्ठत्सु भर्तृत्वं आश्रुत्य वृता असि। भो किशोरि, तन्वि बालिके साध्वि, अलब्ध+ऐहिक+सौख्ये, उत्तमे, अदः अन्यथा कथं कुर्याम्?'।९४। सा प्राह। 'अयं अध्रुवे वितथः मोहः। येन साहजिकं ध्रुवं प्रसाध्यते तत् साधय। अस्मिन् देहे परकीय कल्पना नास्ति एव। अदः वपुः ते अर्ध+अङ्ग+विभागी।'९५। प्रियया सुयुक्ते प्रोक्ते 'तथा' इति असौ प्रोक्त्वा तां गृहे अवरुद्ध्य स+आलयां दग्ध्वा (तत्) भस्म नित्यवत् शिवाय अर्पयत्। प्रसाद+क्षणे भ्रान्त्या प्रियां आह्वयत्।९६।

तिचा तो आग्रह पाहून तो शबर तिला म्हणाला, 'प्रिये सूर्य, भूमी आणि अग्नी यांच्या साक्षीने तुझा पोशिंदा, रक्षणकर्ता म्हणून मी तुझा अंगीकार केला आहे. हे असे विपरीत कृत्य मी कसे करू? तुझ्यासारख्या कोवळ्या वयाच्या सुंदर तरुणीची, जिने अजून पुत्रादि संसारसुखाचा अनुभवही घेतलेला नाही, मी कशी हत्या करू शकेन?'९४. ती शबरी म्हणाली, 'ह्या नाशिवंत शरीराचा हा मिथ्या मोह आहे. ज्याने चिरंतन स्वरूपाची प्राप्ती होईल असे कांही करा. शिवाय ह्या शरीराविषयीचे परकेपण मनातून काढून टाका. हे घटाप्रमाणे इंद्रियगोचर स्थूल शरीर तुमचे हक्काचे अर्धांग आहे.' आपल्या पत्नीचे ते सयुक्तिक बोलणे त्याला पटले. 'ठीक तर! तसेच करतो,' असे म्हणून त्याने तिला घरात कोंडून घातले आणि घरासहित तिला जाळून टाकले. मग ते भस्म घेऊन नित्याप्रमाणे पूजा केली. प्रसाद घेताना नेहमीच्या संवयीने त्याने आपल्या प्रिय पत्नीला हाक मारली.९६.

**दग्धापि साह्वानत आप पूर्ववत् तां सद्म चालोक्य स शङ्कितोऽब्रवीत् ।**
**दग्धापि गेहेन सहागता कथं सुप्तोत्थितास्मीति शबर्युवाच तम् ।।९७।।**
**शम्भुप्रभावोऽस्त्विवति तेन भाषिते द्राक्प्रादुरासीन्निजरूपधृक् शिवः ।**
**दौष्कुल्यदोषं परिहृत्य दर्शनात् ताभ्यां शिवोऽदादुभयत्र काङ्क्षितम् ।।९८।।**
**भक्तेः प्रभावोऽयमियान्न किञ्चित् फलत्यृते भक्तिमतोऽस्य सिद्ध्येत् ।**
**भक्त्येष्टमित्याह स तान्कदाचिद् गच्छन्प्रभुः स्नातुममुं ददर्श ।।९९।।**

सा दग्धा अपि आह्वानतः पूर्ववत् आप। तां, सद्मं च आलोक्य सः शङ्कितः अब्रवीत्। 'गेहेन सह दग्धा अपि कथं आगता?' शबरी तं उवाच, 'सुप्ता उत्थिता अस्मि' इति।९७। 'शम्भु+प्रभावः अस्तु' इति तेन भाषिते, द्राक् शिवः निज+रूप+धृक् प्रादुरासीत्। दर्शनात् दौष्कुल्य+दोषं परिहृत्य ताभ्यां शिवः उभयत्र काङ्क्षितं अदात्।९८। 'अयं इयान् भक्तेः प्रभावम्। भक्तिं ऋते किञ्चित् (अपि) न फलति। अतः अस्य भक्त्या इष्टं सिद्ध्येत्' इति सः तान् आह। कदाचित् प्रभुः स्नातुं गच्छन् अमुं ददर्श।९९।

ती जळून गेलेली असूनही हाकेसरशी आली. तिला पाहून चकित झालेल्या शबराने पाहिले तर घरही पूर्ववत् झालेले. त्याने आश्चर्याने तिला विचारले, 'तू तर जळाली होतीस, मग कशी आलीस?' ती उत्तरली, 'मी तर झोपले होते. तुमच्या हाकेने जागी झाले.'९७. 'ही त्या शंभूचीच कृपा,' असे तो शबर म्हणत असतानाच भगवान् शंकर आपल्या सगुण रूपाने प्रकट झाले. आपल्या दर्शनाने त्यांनी त्या दंपतीचा कुलहीनतेचा दोष दूर केला आणि त्यांना ऐहिक आणि पारलौकिक वैभव अर्पण केले.९८. श्रीगुरू म्हणतात, 'हा असा भक्तीचा प्रभाव आहे! भक्तीविना किंचित् सुद्धा फळ लाभत नाही. म्हणून ह्या ब्राह्मणाचे इष्ट त्याला त्याच्या भक्तीनेच मिळेल,' असे त्या लोकांना त्यांनी सांगितले. पुढे एकदां श्रीगुरू स्नानासाठी संगमावर जात असता त्यांनी त्या ब्राह्मणाला पाहिले.९९.

**तं तादृशं प्रेक्ष्य कमण्डलुस्थ-क्षीरेण तत्प्रोक्ष्य स शुष्ककाष्ठम् ।**
**ददर्श सद्दिव्यदृशा तदेध्मे सद्योऽङ्कुरा भूरिश आविरासन् ।।१००।।**
**दिव्यं स्वधामाङ्कुरितं च काष्ठमदृष्टकुष्ठोऽग्रत आस्थितं तम् ।**
**दृष्ट्वा स काष्ठार्पितदृष्टिमीशं तुष्टाव सत्प्रेमभरानताङ्गः ।।१०१।।**

तादृशं तं प्रेक्ष्य सः कमण्डलुस्थ क्षीरेण तत् शुष्क+काष्ठं प्रोक्ष्य सत+्दिव्य+दृशा ददर्श। तदा इध्मे भूरिशः अङ्कुराः आविरासन्।१००। अदृष्ट+कुष्ठः,दिव्यं स्वधाम, अङ्कुरितं च काष्ठं, अग्रतः आस्थितं तं दृष्ट्वा सः ं सत्+प्रेम+भर+आनत+अङ्गः काष्ठ+अर्पित+दृष्टिं ईशं तुष्टाव।१०१।

त्याला तसे दृढ भक्तीने लाकडाला पाणी घालताना पाहून श्रीगुरूंनी आपल्या कमं डलूतले पाणी त्या सुक्या लाकडावर शिंपडले आणि आपल्या संजीवन दिव्यदृष्टीने पाहिले. तो काय, ते काष्ठ भरपूर पालवीने बहरून गेलेले!१००.

त्याच वेळी त्या ब्राह्मणाचे कुष्ठ निघून गेले आणि त्याचा देह सुवर्ण झाला. ती औदुंबराची कोवळी पाने आणि आपली कांतियुक्त काया पाहून आनंदाने, कृतज्ञतेने आणि सात्त्विक प्रेमभराने झुकलेल्या देहाने नरहरी सद्गदित कंठाने काष्ठावर दृष्टी असलेल्या श्रीगुरूंना उद्देशून पुढील उत्स्फूर्त स्तोत्र गाऊ लागला (हे उपजाती वृत्तांतील अष्टक आहे).१०१.

**कोट्यर्कभं कोटिसुचन्द्रशान्तं विश्वाश्रयं देवगणार्चिताङ्घ्रिम् ।**
**भक्तप्रियं त्वात्रिसुतं वरेण्यं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ॥१०२॥**
**मायातमोऽर्कं विगुणं गुणाढ्यं श्रीवल्लभं स्वीकृतभिक्षुवेषम् ।**
**सद्भक्तसेव्यं वरदं वरिष्ठं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ॥१०३॥**

कोटि+अर्क+भं कोटि+सुचन्द्र+शान्तं विश्व+आश्रयं देव+गण+अर्चित+अङ्घ्रिं भक्त+प्रियं वरेण्यं त्वां अत्रिसुतं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।२। माया+तमः अर्कं, विगुणं गुण+आढ्यं, श्रीवल्लभं, स्वीकृत+भिक्षु+वेषं, सत्+भक्त+सेव्यं, वरदं वरिष्ठं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।३।

कोटी सूर्यांसारखा तेजस्वी असूनही जो कोटी चंद्राप्रमाणे शांत (आल्हादक) आहे, ज्याच्या अधिष्ठानावर हे विश्व स्थिरावले आहे, देवांचे समूह ज्याच्या चरणांची पूजा करीत आहेत, भक्तांना प्रिय असणाऱ्या, निरतिशयानंदरूप, साक्षात् अत्रिनंदन दत्तात्रेयच अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!२. विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत (६:१२५) सांगितल्याप्रमाणे तमोरूप असलेल्या मायेचा (*माया चेयं तमोरूपा*) निरास करणारा जो सूर्य आहे, सर्व गुणांचा आकर असूनही जो गुणातीत आहे, प्रत्यक्ष लक्ष्मीचा पती असूनही ज्याने संन्यासी वेष धारण केला आहे, सद्भक्तांना सेवनीय अशा वरदात्या श्रेष्ठ नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!३.

**कामादिषण्मत्तगजाङ्कुशं त्वामानन्दकन्दं परतत्त्वरूपम् ।**
**सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०४।।**
**सूर्येन्दुगुं सज्जनकामधेनुं मृषोद्यपञ्चात्मकविश्वमस्मात् ।**
**उदेति यस्मिन्रमतेऽस्तमेति वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०५।।**
**रक्ताब्जपत्रायतकान्तनेत्रं सद्दण्डकुण्डीपरिहापिताघम् ।**
**श्रितस्मितज्योत्स्नमुखेन्दुशोभं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०६।।**

कामादि+षट्+मत्त+गज+अङ्कुशं आनन्द+कन्दं पर+तत्त्व+रूपं, सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारं, त्वां वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।४। सूर्य+इन्दु+गुं, सत्+जन+काम+धेनुं, मृषोद्य+पञ्चात्मक+विश्वं अस्मात् उदेति, यस्मिन् रमते, अस्तं एति वन्दे, (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।५। रक्त+अब्ज+पत्र+आयत+कान्त+नेत्रं, सत्+दण्ड+कुण्डी+परिहापित+अघं, श्रित+स्मित+ज्योत्स्न+मुख+इन्दु+शोभं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।६।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर या माजलेल्या हत्तींना आवरणारा अंकुश असा आनंदाचा कंद - म्हणजेच आनंदवल्लीत वर्णिलेल्या मानुष आनंदापासून प्रजापतीच्या आनंदापर्यंतच्या सर्व आनंदांचा स्रोत (*यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसत।* ऋग्वेद संहिता ९:११३:११), परमतत्त्वस्वरूप निरुपाधिक ब्रह्मस्वरूपी, साधू आणि धर्म यांच्या रक्षणाकरिता अवतरलेल्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!४. सूर्य आणि चंद्र ज्याचे डोळे आहेत, सद्भक्तांसाठी जो कामधेनू आहे, हे मिथ्याभूत पाचभौतिक जग ज्या अभिन्ननिमित्तोपादान कारणापासून, दोरीवर सर्प भासावा, तसे उगवते, ज्याच्यात विलसते आणि ज्याच्यात पुनः पाण्यात बुडबुडे विरावे तसे मावळते त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!५. लाल कमळाच्या पानासारखे आकर्ण विशाल नेत्र असलेल्या, आपल्या सात्त्विक दंड आणि कमंडलू यांनी भक्तांची पापे पळवून लावणाऱ्या, ज्याचा मुखचंद्रमा स्मितरूपी चांदण्याने उजळला आहे अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!६.

**नित्यं त्रयीमृग्यपदाब्जधूलिं निनादसद्बिन्दुकलास्वरूपं ।**
**त्रितापतप्ताश्रितकल्पवृक्षं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०७।।**
**दैन्याधिभीकष्टदवाग्निमीड्यं योगाष्टकज्ञानसमर्पणोत्कम् ।**
**कृष्णानदीपञ्चसरिद्युतिस्थं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०८।।**
**अनादिमध्यान्तमनन्तशक्तिमतर्क्यभावं परमात्मसंज्ञं ।**
**व्यतीतवाग्हृत्पथमद्वितीयं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०९।।**

नित्यं त्रयी+मृग्य+पद+अब्ज+धूलिं, निनाद+सत+्बिन्दु+कला+स्वरूपं, त्रि+ताप+तप्त+आश्रित+कल्पवृक्षं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।७। दैन्य+आधि+भी+कष्ट+दव+अग्निं, ईड्यं, योग+अष्टक+ज्ञान+समर्पण+उत्कं, कृष्णा+पञ्च+सरित्+युति+स्थं वन्दे। (हे)नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।८। अन्+आदि+मध्य+अन्तं, अनन्त+शक्तिं अतर्क्य+भावं, परमात्म+संज्ञं, व्यतीत+वाक्+हृत्+पथं, अद्वितीयं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।१०९।

वेदांची त्रयी (ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद) सतत ज्या नित्य पुरुषाच्या चरणकमलांच्या धुळीचा मागोवा घेत असते (पण जिला ती गवसत नाही), नाद, बिन्दू आणि कला या स्वरूपांत योगिजन ज्याचे ध्यान करतात, संसाराच्या आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक तापांनी पोळलेले ज्या कल्पवृक्षाचा आसरा घेतात त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०७. जो दारिद्र्य, मनस्ताप, भय आणि क्लेश यांच्या वनांना जाळणारा अग्नी आहे, जो सर्वांना स्तुत्य आहे, जो (भक्तांना, साधकांना आणि यतींना) अष्टांग योगाचे ज्ञान समर्पण करण्यास सदैव उत्सुक असतो, अशा कृष्णा आणि पंचनदी यांच्या संगमावर निवसणाऱ्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०८. ज्याला ना आदि आहे, ना मध्य ना अंत, ज्याच्या सामर्थ्याला सीमाच नाही, ज्याचा भाव (अभिप्राय) अतर्क्य आहे, ज्याला परमात्मा म्हणतात आणि जो वाचा आणि मन आणि यांच्या आवाक्याबाहेर आहे त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर! **वाग्हृत्पथम्** याऐवजी **वाग्दृक्पथम्** असाही पाठ आहे.१०९.

**स्तोत्रे क्व ते मेऽस्त्युरुगाय शक्तिश् चतुर्मुखो वै विमुखोऽत्र जातः ।**
**स्तुवन्द्विजिह्वोऽभवदीश्वर त्वां सहस्रवक्त्रश्चकितोऽपि वेदः ।।११०।।**
**स्तुत्वैवं प्रणतीश्चक्रे तमाश्वास्याब्रवीद्विभुः । मत्प्रसादान्महत्त्वश्री-कीर्तिसत्पुत्रवान्भव ।।१११।।**
**शिष्योत्तम त्वं योगज्ञो भविष्यसि कुलं च ते । त्वद्वद्भविष्यत्यानीय वधूं तिष्ठ ध्रुवं त्विह ।।११२।।**
**तथेत्युक्त्वा द्विजो भार्यामानीय स तया सह । तत्र तस्थौ ततो लेभे पुत्रान्पुत्रीं स सत्तमान् ।।११३।।**
**विद्यासरस्वतीमन्त्रं गुरुदत्तं जपन्वरम् । भेजे गुरुं भवासक्तो जीवन्मुक्तोऽभवद् द्विजः ।।११४।।**

(हे) उरु+गाय ते स्तोत्रे मे क्व शक्तिः? अत्र चतुर्मुखः वै विमुखः जातः। (हे) ईश्वर, त्वां स्तुवन् सहस्र+वक्त्रः द्वि+जिव्हः अभवत्। वेदः अपि चकितः।११०। एवं स्तुत्वा प्रणतीः चक्रे। विभुः तं आश्वास्य अब्रवीत्। 'मत् प्रसादात् महत्त्व+श्री+कीर्ति+सत्पुत्र+वान् भव। (हे) शिष्य+उत्तम, त्वं योगज्ञः भविष्यसि। ते कुलं च त्वत्+वत् भविष्यति। वधूं आनीय इह तु ध्रुवं तिष्ठ।'१११-१२। द्विजः 'तथा' इति उक्त्वा भार्यां आनीय तया सह सः तत्र तस्थौ। ततः सः सत्तमान् पुत्रान् पुत्रीन् लेभे। गुरुदत्तं वरं विद्या+सरस्वती+मन्त्रं जपन् गुरुं भेजे। द्विजः भव+असक्तः जीवन्+मुक्तः अभवत्।११३-१४।

हे प्रभो, आपली कीर्ती थोरामोठ्यांनी गाइली आहे. मला एवढे सामर्थ्य कुठे आहे? ब्रह्मदेव चार मुखांनी आपले यश गाऊन थकला. हजार मुखांच्या शेषाच्याही जिभा तुला स्तवून फाटल्या. वेदही (नेति नेति म्हणत) स्तंभित झाले, तर आपल्या स्तवनाला माझी शक्ती कशी पुरी पडेल?११०.

अशी स्तुती करून त्या ब्राह्मणाने श्रीगुरूंना लोटांगणे घातली. प्रभू त्याला आश्वासन देत म्हणाले, 'माझ्या कृपाप्रसादाने तुला मोठेपण, संपत्ती, कीर्ती आणि सत्पुत्रांचा लाभ होईल. तुझा वंशही तुझ्यासारखाच होईल. आता तू आपल्या पत्नीला घेऊन ये आणि इथे गाणगापुरातच कायम राहा.'१११-१२. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो नरहरी ब्राह्मण पत्नीला घेऊन येऊन गाणगापुरातच राहिला. पुढे त्याला उत्तम पुत्र आणि कन्या झाले. श्रीगुरूंनी दिलेल्या श्रेष्ठ विद्यासरस्वती मंत्राचा जप करीत तो गुरूंची भक्ती करीत राहिला. त्या गुरुभजनाच्या प्रभावाने तो संसारातून विरक्त होऊन जीवन्मुक्त झाला.११३-१४.

**तत्कुलं चापि तत्तुल्यं तद्भक्तिमहिमा त्वियान् । त्वत्पूर्वजोऽपि तत्तुल्यस् तस्मात्ते मतिरीदृशी ।।१५।।**
**सद्गुरोस्तु प्रसादोऽयं भविष्यत्यपि ते कुले । वर्धमानः सदैवेति संविन्मे ब्राह्मण ध्रुवा ।।११६।।**

**।। इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिमहिमावर्णनं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

**।। आदित एकोनविंशोऽध्यायः ।।**

**सप्ताहपारायणे पञ्चमः । अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिनारम्भे गुरुस्तुतिः ।**

तत् कुलं अपि तत् तुल्यम्। इयान् तत्+भक्ति+महिमा। त्वत्+पूर्वजः अपि तत्+तुल्यः। तस्मात् ते ईदृशी मतिः।१५। (हे) ब्राह्मण, अयं सद्गुरोः सदा एव वर्धमानः प्रसादः तु, ते कुले अपि भविष्यति इति मे ध्रुवा संवित्।११६।

मुंडकोपनिषदाच्या वचनाप्रमाणे (*न अस्याऽब्रह्मवित्कुले।* ३:२:९), त्याचे वंशजही त्याच्यासारखे गुरुभक्त झाले. असा श्रीगुरूंच्या भक्तीचा महिमा आहे. तुझे पणजोबाही त्या नरहरीसारखेच होते. म्हणून तर तुझी बुद्धी अशी गुरुभजनप्रवण आहे. अरे नामधारका, हा सद्गुरूंचा सतत वर्धिष्णु कृपाप्रसाद तुझ्याही वंशावरही राहणार आहे अशी ग्वाही माझे मन देत आहे.११५-१६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पहिला आणि प्रथमपासून एकूणविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ विंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**को मत्पूर्वः कथं तेन सेवितो भगवान्प्रभुः । यत्प्रभावान्ममेदृग्द्धीस् तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**प्रागुक्तं यवनात् त्रातः सायंदेव इति प्रिय । पूर्वः स एव तेऽश्रौषीद्गुरुं गन्धर्वपूःस्थितम् ।।२।।**
**तत्रैत्य प्रणतो विप्रो मठे दृष्ट्वा परात्परम् । नत्वा दण्डवदस्तौषीदुपसंगृह्य पद्द्वयम् ।।३।।**
**परमात्मन्परञ्ज्योतिः श्रीनृसिंहसरस्वति । भक्तेश श्रुतिचिन्त्यं ते सर्वतीर्थाश्रयं पदम् ।।४।।**

नामधारक उवाच। यत् प्रभावात् मम ईदृक् धीः कः मत्+पूर्वः? तेन कथं भगवान् प्रभुः सेवितः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।१। सिद्ध उवाच। (हे) प्रिय, प्राक् यवनात् सायंदेवः त्रातः इति उक्तम्। सः एव ते पूर्वः गुरुं गन्धर्वपुरं स्थितं अश्रौषीत्।२। प्रणतः विप्रः तत्र एत्य परात्परं दृष्ट्वा दण्डवत् नत्वा पद्+द्वयं उपसंगृह्य अस्तौषीत्।३। (हे) परमात्मन्, परंज्योतिः, श्रीनृसिंहसरस्वति, भक्तेश श्रुति+चिन्त्यं ते पदं सर्व+तीर्थ+आश्रयम्।४।

*विसाव्यांत परीक्षूनि सायंदेवावरि प्रसाद करिती। श्रीगुरु काशीयात्रा तसे अनंतव्रत निरूपिती।।१।।* नामधारकाने विचारले, 'आपण ज्या माझ्या पूर्वजामुळे माझी अशी सद्बुद्धी झाली म्हणता तो कोण? त्याने सद्गुरू भगवानांची कशा प्रकारे सेवा केली? हे ऐकण्यास मी सादर आहे.१. सिद्ध म्हणतात, 'मागे नवव्या अध्यायात ज्या सायंदेवाचे यवनापासून रक्षण केले असे सांगितले, त्याच तुझ्या पूर्वजाच्या कानांवर श्रीगुरू गाणगापुरी राहिले आहेत ही वार्ता पडली.२. तेव्हा तो विनीत ब्राह्मण गाणगापूरला आला आणि परमश्रेष्ठ सद्गुरूंना पाहून दंडवत घालून भावभराने त्यांचे पाय धरून स्तुती करू लागला.'३. 'परमात्मस्वरूपी सद्गुरो, आपण सूर्यादि तेजोमयांचेही प्रकाशक आहा. भक्तांचे स्वामी श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराज, आपले वेदांनी ध्याइलेले पाय सर्व तीर्थांना आश्रयभूत आहेत.४.

**न मर्त्यस्त्वं महेशोऽसि त्रय्यात्मा मानवाकृतिः । प्राणदानक्षमाम्बवाढ्य-कमण्डलुकरोऽसि कः ।।५।।**
**दुष्टनिग्रहसद्रक्षा-क्षमदण्डकरोऽस्यजः । शिवोऽसि मुक्तिदः पाप-तापनाशक्षमोग्रदृक् ।।६।।**
**मृतो जीवितो येन दुग्धा लुलायी वशा शुष्ककाष्ठं तरुत्वं प्रणीतम् ।**
**क्षणादन्त्यजोऽप्युद्धृतस्तेऽनुभावं क्षितौ कोऽर्हति ज्ञातुमन्यत्तवापि ।।७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**स्तुत्यानयास्मि ते विप्र भृशं तोषमुपागतः । भूयात्ते वंशमात्रस्य श्रद्धाभक्तिर्मयि ध्रुवा ।।८।।**

त्वं मर्त्यः न। त्रयी+आत्मा मानव+आकृति महेशः असि। प्राण+दान+क्षम+अम्ब+आढ्य+कमण्डलु+करः कः असि।५। दुष्ट+निग्रह+सत्+रक्षा+क्षम+दण्ड+करः अजः असि। मुक्तिदः पाप+ताप+नाश+क्षम+उग्र+दृक् शिवः असि।६। 'येन मृतः जीवितः, वशा लुलायी दुग्धा, शुष्क+काष्ठं तरुत्वं प्रणीतं, अन्त्यजः अपि क्षणात् उद्धृतः, ते अनुभावं क्षितौ कः अपि ज्ञातुं अर्हति?'।७। श्रीगुरुः उवाच। '(हे) विप्र, अनया स्तुत्या भृशं तोषं उपागतः अस्मि। ते वंशमात्रस्य मयि ध्रुवा श्रद्धाभक्तिः भूयात्।८।

आपण मर्त्य मानव नाहीत तर मानवाचे रूप घेतलेले त्रयमूर्ती महेश आहात. प्राणदानाचे सामर्थ्य असलेल्या जलाने भरलेले कमंडलू हाती धरलेले ब्रह्मदेव (**कः**) आपण आहा.'५. दुष्टांचा निग्रह आणि सज्जनांचे रक्षण करण्याची क्षमता असलेला दंड धारण केलेले भगवान् विष्णू आपणच आहात. पाप आणि ताप यांचा नाश करण्याची शक्ती असलेल्या उग्र दृष्टीचे मुक्तिदायक भगवान शंकर आपण आहा.६. 'ज्यांनी मृताचेही संजीवन केले, वांझ महिषी दुभविली, वाळल्या काष्ठाचा बहरलेला वृक्ष केला, क्षणभरांत अंत्यजाचाही उद्धार केला, त्या आपले सामर्थ्य ह्या भूतलावर कोण जाणण्याजोगा आहे?'७. श्रीगुरू म्हणाले, 'ब्राह्मणा, ह्या तुझ्या स्तुतीने मी खूप प्रसन्न झालो आहे. तुझ्या वंशांतील सर्वांची माझ्यावर स्थिर श्रद्धा आणि भक्ती राहील.८.

**कच्चित्क्षेमं युवत्यादेस् तव ब्रूहि क्व तिष्ठसि । कालेन बहुना विप्र संगतोऽस्यद्य मत्प्रिय ।।९।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ भगवन्त्वत्प्रसादतः । सर्वेषां क्षेममस्तीश काञ्च्यां तिष्ठाम्यहं स्वकैः ।।१०।।**
**योगक्षेमेक्षका भ्रातृ-पुत्रा मे तेऽनुकम्पया । त्वत्पादाब्जरसं पातुमलिप्रायोऽस्मि सम्प्रति ।।११।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कष्टं मे सेवनं नाज्ञ कोऽपि ज्ञातुं न शक्यते । ग्रामे नदीतटेऽरण्ये दुर्गमेऽपि वसाम्यहम् ।।१२।।**

तव युवत्यादेः कच्चित् क्षेमं (अस्ति)? क्व तिष्ठसि? ब्रूहि। (हे) विप्र, मत्+प्रिय, बहुना कालेन अद्य संगतः असि।'९। सायंदेव उवाच। '(हे) देवदेव, जगत्+नाथ, भगवन् त्वत्+प्रसादात् सर्वेषां क्षेमं अस्ति। (हे) ईश अहं स्वकैः काञ्च्यां तिष्ठामि।१०। मे भ्रातृ+पुत्राः ते अनुकम्पया योग+क्षेम+ईक्षकाः। सम्प्रति त्वत्+पाद+अब्ज+रसं पातुं अलिप्रायः अस्मि।'११। श्रीगुरुः उवाच (हे) न+अज्ञ , मे सेवनं कष्टं कः अपि ज्ञातुं न शक्यते। अहं ग्रामे, नदी+तटे, अरण्ये, दुर्गमे अपि वसामि।१२।

तुझी पत्नी आणि सर्व कुटुंबीयांचे क्षेमकुशल आहे ना? आणि तू कुठे राहतोस? मला सर्व सांग बरे! माझ्या प्रिय ब्राह्मणा, किती दिवसांनी तू आज भेटतो आहेस?'९. सायंदेव उत्तरला, 'देवाधिदेवा, जगन्नाथा, भगवंता, आपल्या प्रसादाने माझे बंधुवर्ग आणि पुत्र यांचा योगक्षेम चांगला चालला आहे. आत्ता मी आपल्या पदकमलांच्या मकरंदाचे पान करण्यासाठी भ्रमर होऊन आलो आहे.'११. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'माझी सेवा किती कठीण आहे तुला कळत नाही असे नाही. अरे कुणालाही - देवादिकांनाही, ते कळणे शक्य नाही. मी कधी गावात राहतो, तर कधी नदीकिनारी, कधी अरण्यात तर कधी आणखी दुर्गम ठिकाणी!'१२.

**तच्छुत्वा सोऽनुयास्यामि यत्र क्वापीत्थमाददे । तथेत्युक्त्वैकदा शम्भुस् तेनागात्सह संगमम् ।।१३।।**
**निवार्यान्यान्समं तेन स्थित्वाश्वत्थतले निशि । वृष्ट्यै तदादिदेशाब्दमकालेऽपि परीक्षितुम् ।।१४।।**
**गर्जिताब्दो ववर्षारं झञ्झावातसखस्तदा । क्षणप्रभापि मुष्णन्ती दृष्टिमासीदनुक्षणम् ।।१५।।**
**उपर्युपरि वस्त्रैस्तं समन्तात्स प्रकम्पितम् । सहिष्णुः श्रीगुरुं भेज आसारार्तिरणद् द्विजः ।।१६।।**
**यामाभ्यां खण्डितं वर्षं दृष्ट्वोचे तं गुरुः पुरम । गत्वाग्निमानयात्यन्तं क्लिन्नाङ्गे शीतमुत्थितम् ।।१७।।**

तत् श्रुत्वा सः 'यत्र क्व अपि अनुयास्यामि' इत्थं आददे। 'तथा' इति उक्त्वा शम्भुः तेन सह संगमं अगात्।१३। निशि अन्यान् निवार्य तेन समं अश्वत्थ+तले स्थित्वा तदा (तं) परीक्षितुं अकाले अपि अब्दं वृष्ट्यै आदिदेश।१४। तदा झंझावात+सखः गर्जित+अब्दः अरं ववर्ष। क्षणप्रभा अपि अनुक्षणं दृष्टिं मुष्णन्ती आसीत्।१५। सः आसार+आर्ति+रणत्+द्विजः सहिष्णुः उपरि+उपरि वस्त्रैः प्रकम्पितं गुरुं भेजे।१६। वर्षं यामाभ्यां खण्डितं दृष्ट्वा गुरुः तं ऊचे। क्लिन्न+अङ्गे अत्यंतं शीतं उत्थितम्। पुरं गत्वा अग्निं आनय।१७।

त्यावर 'आपण जिथे कुठे जाल तिथे मी आपल्या मागे येईन,' असे त्याने अंगीकारले. 'ठीक आहे,' असे म्हणून श्रीगुरू एकदा त्याच्याबरोबर संगमावर गेले.१३. रात्री इतर सर्वांना पाठवून फक्त सायंदेवालाच ठेवून त्यांनी मेघाला अकालीच वर्षा करण्याचा आदेश दिला.१४. तेव्हा झंझावातासह गरजणारे मेघ धो धो कोसळू लागले. क्षणोक्षणी डोळे दिपवणारी वीजही (**क्षणप्रभा**) चमकू लागली.१५. भिजून चिंब झालेल्या सायंदेवाचे दात वाजू लागले. ते सर्व सहन करीत त्या ब्राह्मणाने थरथरणाऱ्या श्रीगुरूंच्यावर वस्त्रे धरून त्यांची सेवा केली.१६. दोन प्रहरांनी पाऊस ओसरल्याचे पाहून श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंग चिंब भिजले आहे आणि थंडी फार वाजते आहे. गावात जाऊन विस्तव आण. मात्र जाताना इकडे तिकडे कुठे पाहू नकोस आणि माझे चिंतन करीत जा.'१७.

**कुत्रापीततस्ततोऽपश्यन् याहि मामनुचिन्तयन् । तच्छ्रुत्वागात्स करक-चूर्णिताङ्गोपि शीकरैः ॥१८॥**
**क्लेदितात्माप्यनुध्यायन् चञ्चलातेजसोऽयनम् । प्रविश्य गोपुराद् द्वाःस्थ-दत्तमार्गः पुरं स तु ॥१९॥**
**गृहीतभाजनन्यस्त-वह्निः शीघ्रं न्यवर्तत । ज्ञातुं गुरूक्तिहेतुं स व्यधाद् दृष्टिमितस्ततः ॥२०॥**
**पार्श्वद्वयतलस्थोग्र-सर्पौ दृष्ट्वाऽगमज्जवात् । दृष्ट्वानुयातावपि तौ भीतो दध्यौ हरेः पदम् ॥२१॥**
**तदोच्चैः सङ्गमे वेद-ध्वनिं श्रुत्वा विलोक्य च । द्योतं भ्रान्तो द्रुतं प्राप्य दृष्ट्वैकं स्वगतं द्विजः ॥२२॥**
**कैः कृतोऽयं ध्वनिर्द्योतः क्वेत्यभूच्छङ्कितः स तम् । भीतं प्राह गुरुर्मा भीस्त्वद्गुप्त्यै तौ प्रचोदितौ ॥२३॥**

इतः ततः कुत्र अपि अपश्यन् मां अनुचिन्तयन् याहि। तत् श्रुत्वा करक+चूर्णित+अङ्गः अपि शीकरैः क्लेदित+आत्मा अपि सः चञ्चला+तेजसः अयनं अनुध्यायन् अगात्। गोपुरात् द्वाः+स्थ+दत्त+मार्गः पुरं प्रविश्य तु सः गृहीत+भाजन+न्यस्त+वह्निः शीघ्रं न्यवर्ततत। सः गुरु+उक्ति+हेतुं ज्ञातुं दृष्टिं इतस्ततः व्यधात्।१८-२०। पार्श्व+द्वय+तलस्थ+उग्र+सर्पौ दृष्ट्वा जवात् अगमत्। तौ अपि अनुयातौ दृष्ट्वा भीतः हरेः पदं दध्यौ।२१। तदा सङ्गमे उच्चैः वेदध्वनिं श्रुत्वा द्योतं च विलोक्य भ्रान्तः द्रुतं प्राप्य एकं (गुरुं) दृष्ट्वा द्विजः स्वगतं, 'कैः अयं ध्वनिः कृतः? क्व द्योत?' इति शङ्कितः अभूत्। सः गुरुः तं भीतं प्राह, 'मा भीः। तौ त्वत्+गुप्त्यै प्रचोदितौ'।२२-२३।

ते ऐकून गारांचा मार खात आणि पावसाच्या रिमझिमीत भिजत तो त्या अंधाऱ्या रात्री विजेच्या प्रकाशाने रस्ता निरखीत निघाला.१८. गोपुरात द्वारपालांनी वाट दिल्यावर तो गाणगापुरात प्रवेशला आणि एका भांड्यात विस्तव घेऊन घाईने परतला. येतांना गुरूंनी इकडे तिकडे न पाहायला का सांगितले म्हणून त्याने दोन्ही बाजूंना दृष्टी टाकली.१९-२०. आपल्या दोन्ही बाजूंना दोन भयंकर साप येताना पाहून तो घाबरून पळू लागला. तरीही ते साप आपल्या मागेच येत असलेले पाहून भीतीने तो श्रीगुरूंच्या पायांचे ध्यान करू लागला. तेव्हा त्याला संगमाकडून मोठा वेदध्वनी ऐकायला आला आणि खूप प्रकाशही दिसला. त्वरेने येऊन पाहता त्याला फक्त एकटे श्रीगुरूच दिसले.२१. तो 'हा आवाज कुणी केला आणि प्रकाश कुठला?' अशा विचाराने गोंधळून गेला. त्याला तसा घाबरलेला पाहून श्रीगुरू म्हणाले, 'अरे ते साप तुझ्या रक्षणासाठी पाठविले होते.'२२-२३.

**तदाप्यही गुरुं नत्वा जग्मतुस्तं प्रभुर्द्विजम् । प्राहेदृशी गुरोः सेवा मरुतामपि दुष्करा ।।२४।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भगवन्ननुकम्पाब्धे शरणागतवत्सल । सेवातत्त्वमुपाख्याहि श्रीगुरोस्तारकं परम् ।।२५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**छायौपम्येन संसेव्यो गुरुस्तत्त्वमिदं परम् । प्रार्पयेन्नियतं देहं सार्थं तस्मै परात्मदृक् ।।२६।।**
**सर्वभावेन बुद्ध्वेशं तं भजेत्तत्प्रसादभुक् । तद्ध्यानजीवनस्तत्पत् तीर्थपस्तत्कथारतिः ।।२७।।**

तदा अही अपि गुरुं नत्वा जग्मतुः। प्रभुः तं द्विजं प्राह, 'ईदृशी गुरुसेवा मरुतां अपि दुष्करा।'२४। सायंदेव उवाच। '(हे) भगवन्, अनुकम्पा+अब्धे शरण+आगत+वत्सल, परं तारकं श्रीगुरोः सेवा+तत्त्वं उपाख्याहि।'२५। श्रीगुरुः उवाच। 'गुरुः छाया+औपम्येन संसेव्यः इदं परं तत्त्वम्। पर+आत्म+दृक् तस्मै स+अर्थं देहं प्रार्पयेत्।२६। तं सर्व+भावेन ईशं बुद्ध्वा तत्+प्रसाद+भुक् तत्+ध्यान+जीवनः तत्+पत्+तीर्थ+पः तत्+कथा+रतिः तं भजेत्।'२७।

तेवढ्यात ते सापही श्रीगुरूंना वंदन करून निघून गेले. प्रभू त्या ब्राह्मणाला म्हणाले, 'अशी ही गुरुसेवा देवादिकांनाही दुष्कर आहे. तू तर माणूस आहेस.'२४. तेव्हा सायंदेवाने प्रार्थना केली, 'अहो दयासागर शरणागतवत्सल भगवंता, श्रेष्ठ तरणोपाय असलेले श्रीगुरूंच्या सेवेचे तत्त्व आपण मला समजावून सांगावे.'२५. श्रीगुरूंनी सांगायला आरंभ केला. 'माणसाची सावली जशी उठता, बसता, चालता त्याच्या बरोबर राहते त्याचप्रमाणे निरंतर गुरूंच्या सेवेत राहावे, हेच परम तत्त्व आहे. परमार्थावर दृष्टी ठेवून धनासह तनू त्याना वाहून टाकावी.'२६. सर्व भावांनी त्याला परमेश्वर मानून त्याचा प्रसाद घ्यावा, त्याच्या ध्यानात जीवन वेचावे, त्याच्या पायाचे तीर्थ घ्यावे, त्याच्या कथांतच रमावे आणि त्यालाच भजावे.२७.

**दुःसाध्येऽपि यदादिष्टं कार्ये भक्त्या तदारभेत् । आरब्धं स नयेत्सिद्धिं भीतः कालोऽप्यपैत्यतः ॥२८॥**
**शृणु गौरीशसंवादं ब्राह्मस्त्वष्टाभजद् गुरुम् । विद्यार्थी सर्वभावात्तद् दार्ढ्यं ज्ञातुं गुरुर्जगौ ॥२९॥**
**वर्षास्वापः पतन्त्यत्र प्रत्यब्जमुटजे त्वतः । रचयैकं गृहं रम्यं सुखदं नूत्नवत्सदा ॥३०॥**
**शिष्यं तदाश्रुत्य यान्तं गुरुस्त्रीः प्राह कञ्चुकम् । देहि मेऽङ्गमितं चित्रं मनोहरमकृत्रिमम् ॥३१॥**
**पुत्रोऽप्याहाङ्घ्रियोग्ये मे पादुके देहि येऽम्भसि । गर्तेऽपि यातुः सुखदे चिन्तितस्थलनायके ॥३२॥**

दुःसाध्ये अपि कार्ये यत् आदिष्टं तत् भक्त्या आरभेत्। सः आरब्धं सिद्धिं नयेत्। अस्मात् भीतः कालः अपि अपैति। अतः(?)।२८। गौरी+ईश+संवादं शृणु। ब्राह्मः त्वष्टा विद्यार्थी गुरुं सर्व+भावात् अभजत्। गुरुः तत् दार्ढ्यं ज्ञातुं जगौ।२९। 'प्रति+अब्जं वर्षासु उटजे आपः पतन्ति। अतः एकं रम्यं सुखदं सदा नूत्नवत् गृहं रचय।'३०। तदा गुरुस्त्रीः शिष्यं यातं आश्रुत्य प्राह, 'मे अङ्ग+मितं चित्रं मनोहरं अकृत्रिमं कञ्चुकं देहि।'३१। पुत्रः अपि आह, 'मे अङ्घ्रियोग्ये सुखदे चिन्तित+स्थल+नायके पादुके देहि, ये गर्ते अपि यातुः।'३२।

श्रीगुरूंनी जरी एखादे दुष्कर असे कार्य करण्याची आज्ञा केली तरी भक्तीने त्या कामाला लागावे. शिष्याने आरंभिलेले कार्य गुरू सिद्धीला नेतातच. प्रत्यक्ष काळही ह्या गुरुभक्ताला वचकून असतो, त्यामुळे मरणाचीही भीती बाळगू नये.२८. याविषयी एक शिव आणि पार्वती यांच्यांतील संवाद ऐक. ब्रह्मदेवाचा पुत्र त्वष्टा विद्या शिकण्यासाठी म्हणून सर्वभावे गुरूला भजत होता. त्याची भक्ती किती दृढ आहे ह्याची परीक्षा घेण्यासाठी गुरुजी त्याला म्हणाले, 'अरे शिष्या, दर वर्षी पावसाळ्यात आपल्या घरात पाणी गळते. तू एक सुंदर सुखदायक नेहमी नवीन राहील असे नेटके घर बांधून दे.'३०. तेव्हा तो शिष्य कामाला जातो आहे असे ऐकून गुरुपत्नी म्हणाली, 'बाळा, मला एक छानशी, न शिवलेली, कायम माझ्या अंगाला येणारी चोळी करून दे.'३१. गुरुपुत्रानेही आपली मागणी केली. 'मला माझ्या मापाच्या सुखद पादुका करून दे, ज्या खड्ड्यांतूनही जातील आणि मला हव्या त्या ठिकाणी घेऊन जातील.'३२.

**कन्याह कुण्डले दन्ति-दन्तभूतं प्रदेहि मे । लसत्क्रीडागृहं चैक-स्तम्भं पुत्तलिका अपि ।।३३।।**
**सचेतनाः सदा येषु पाकः शैत्यं न यास्यति । अनञ्जनस्पृग्भाण्डानीत्याकर्ण्य स ययौ वनम् ।।३४।।**
**अज्ञोऽस्म्यप्यत्र गुर्वर्थं मर्तव्यमिति तं वने । निर्विण्णमाययौ कश्चिदवधूतो दयार्द्रधीः ।।३५।।**
**व्यपेतभीः प्रहृष्टात्मा गुरुभावनया स तम् । उपसंगृह्य तत्तस्मै शशंस गुरुभाषितम् ।।३६।।**
**तमाश्वास्याब्रवीत्साधुः काशीक्षेत्रे त्वभीष्टदे । सति जाग्रति विश्वेशे किं केषां दुर्लभं वद ।।३७।।**

कन्या आह। मे कुण्डले, दन्ति+दन्त+भूतं लसत् एक+स्तम्भं क्रीडा+गृहं, सचेतनाः पुत्तलिकाः, अन्+अञ्जन+स्पृक् भाण्डान् येषु पाकः शैत्यं न याति, प्रदेहि। इति आकर्ण्य सः वनं ययौ।३३-३४। 'अज्ञः अस्मि। गुरु+अर्थं अत्र मर्तव्यं' इति निर्विण्णं तं कश्चित् दया+आर्द्र+धीः अवधूतः आययौ।३५। व्यपेत+भीः प्रहृष्ट+आत्मा सः तं गुरु+भावनया उपसंगृह्य तस्मै गुरु+भाषितं शशंस।३६। साधुः तं आश्वास्य अब्रवीत्। अभीष्ट+दे काशीक्षेत्रे तु विश्व+ईशे जाग्रति केषां किं दुर्लभम्, वद।३७।

तेवढ्यात गुरुकन्याही त्याला म्हणाली, 'कुंडले, हस्तीदंताचे बनवलेले एकखांबी खेळातले घर, जिवंत पुतळ्या, ज्यांना काजळी लागणार नाही आणि ज्यात स्वयंपाक थंड होणार नाही अशी भांडी, असे सर्व मला दे.' ह्या सर्वांच्या मागण्या ऐकून तो त्या पुरविण्यासाठी वनात गेला.३३-३४. 'मी तर एक अजाण बालक आहे. हे सगळे मी कुठून आणणार? इथे गुरूंच्या कामात जीव द्यावा' अशा विचाराने निराश झाला असता तिथे कुणी दयार्द्र अंतःकरणाचा एक अवधूत आला.३५. त्याला पाहून त्या त्वष्ट्याची भीती गेली आणि त्याचे मन प्रसन्न झाले. त्या अवधूताला 'हे आपले गुरूच आहेत' असे मानून त्याने त्यांचे पाय धरले आणि त्याला आपल्या गुरूंच्या आणि इतरांच्या मागण्या सांगतल्या.३६. त्या साधूंनी त्याला धीर दिला आणि म्हणाले, 'आपल्या अभीष्टाची पूर्ती करणाऱ्या काशीक्षेत्रात विश्वेश्वर सदैव जागत असता कुणाला काय दुर्लभ आहे? सांग.'३७.

**तत्रत्यपुण्यं को वेत्ति तद्वास्युद्वीक्षणादपि । अपैत्यघौघः किं वाच्यं सुखमानन्दकानने ।।३८।।**
**पुमर्थदोऽपि विश्वेशः प्राणिमात्रं मृतं क्षणात् । स तारकोपदेशेन दत्ते मुक्तिमनुक्षणम् ।।३९।।**

**।। शिष्य उवाच ।।**

**क्वास्ते काशी क्व विश्वेशो जाने स्वर्भुवि वा न तत् । प्रार्थये तारकं त्वां मे दर्शयाज्ञोऽस्मि केवलम् ।।४०।।**
**स प्राह त्वां नयाम्यद्य त्वद्योगात् क्षेत्रदर्शनम् । स्यान्मेऽप्ययत्नतो जन्म-साफल्यं यद्यदीक्षणात् ।।४१।।**
**तमादाय ततो योग-गत्या शीघ्रं महामुनिः । काशीं गत्वा क्षेत्रयात्रां यथाक्रममुपादिशत् ।।४२।।**

'तत्रत्यपुण्यं कः वेत्ति? तत्+वासी+उद्वीक्षणात् अपि अघ+ओघः अपैति। आनन्द+कानने सुखं किं वाच्यम्?'३८। 'विश्वेशः पुं+अर्थदः अपि मृतं प्राणि+मात्रं सः तारक+उपदेशेन क्षणात् अनुक्षणं मुक्तिं दत्ते।'३९। शिष्य उवाच। काशी क्व आस्ते? क्व विश्वेशः? तत् स्वः भुवि वा न जाने। त्वां (अहं) प्रार्थये, मे दर्शय, केवलं अज्ञः अस्मि।४०। ततः महा+मुनिः तं आदाय योग+गत्या शीघ्रं काशीं गत्वा यथाक्रमं काशी+यात्रां उपादिशत्।४२।

त्या काशी क्षेत्रात राहणाऱ्यांचे पुण्य कोण जाणू शकेल? काशीवासियांच्या दर्शनानेसुद्धा पापांच्या राशी नष्ट होतात. ज्याचे नावच आनंदकानन आहे त्या काशी क्षेत्रातील सुखाचे काय वर्णन करावे?३८. तिथे विश्वेश्वर पुरुषार्थ तर पुरवतातच, पण तिथे मृत्यू पावणाऱ्या प्रत्येक प्राणीमात्राला सतत तारक मंत्राचा (रामनाम किंवा ॐकार) उपदेश करून मुक्ती देत असतात. तारसार उपनिषदात आणि पुराणातही '*तारकं ब्रह्म व्याचष्टे*' असे वचन आहे.३९. शिष्याने विचारले, 'ही काशी आणि विश्वेश्वर कुठे आहेत. भूमीवरच आहेत की स्वर्गांत मला ठाऊक नाही. महाराज, मी आपल्याला प्रार्थना करतो की आपणच मला दाखवावे. मी अगदी अजाण आहे!'४०. तेव्हां ते महामुनी त्याला घेऊन योगगतीने काशीला गेले आणि त्याला क्रमशः संपूर्ण काशीयात्रेचे निरूपण केले.४२.

**विश्वेशदर्शनं चान्तर् गृहयात्रां यथाक्रमम् । दक्षिणोदङ्मानसाख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात् ॥४३॥**
**स्नानदानार्चनश्राद्ध-युक्तां यात्रां च पाक्षिकीम् । भवानीशो हरिर्धुण्डिर् दण्डपाणिश्च भैरवः ॥४४॥**
**गुहः काशी च गङ्गाद्या देवा लिङ्गानि सर्वशः । इत्यादीनां पूजनं च निवेद्य स्थापनं तथा ॥४५॥**
**स्वनामाङ्कितलिङ्गस्य कथयित्वा यथोक्तवत् । कुरु प्रसीदेद्विश्वेश इत्युक्त्वान्तर्दधे स्वयम् ॥४६॥**
**मद्भावस्य परीक्षायै गुरु रूपान्तरादयम् । प्राप्तः किलेति मत्वा स यथानिर्दिष्टमाचरत् ॥४७॥**

यथा+क्रमं विश्वेश+दर्शनं, अन्तः+गृह+यात्रां च, दक्षिण+उदक्+मानस+आख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात्..।४३। स्नान+दान+अर्चन+ श्राद्ध+युक्तां पाक्षिकीं यात्रां च, भवानी, ईशो, हरिः धुण्डिः दण्डपाणिः च भैरवः,।४४। गुहः काशी च गङ्गा आद्याः देवाः सर्वशः लिङ्गानि इत्यादीनां पूजनं निवेद्य तथा..।४५। स्व+नाम+अङ्कित+लिङ्गस्य स्थापनं कथयित्वा 'यथा+उक्त+वत् कुरु, विश्वेश प्रसीदेत्' इति उक्त्वा स्वयं अन्तर्दधे।४६। सः 'अयं मत्+भावस्य परीक्षायै गुरुः रूपान्तरात् प्राप्तः किल,' इति मत्वा सः यथा+निर्दिष्टं आचरत्।४७।

क्रमशः विश्वेश्वराचे दर्शन, अंतर्गृहयात्रा, दक्षिणमानसयात्रा, उत्तरमानसयात्रा, पञ्चक्रोशीची यात्रा,(४३) स्नान, दान, पूजा, श्राद्ध यांसह शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या यात्रा, भवानी, विश्वेश्वर, विष्णू, धुण्डिराज, दण्डपाणि तसेच भैरव,(४४) गुह, काशी, गंगा इत्यादि देवांच्या आणि सर्व लिंगांची पूजा सांगून स्वतःच्या नावाचे लिंग स्थापन करण्यास सांगून, 'मी जसे सांगितले तसे सर्व कर,' असे बोलून ते महामुनी अंतर्धान पावले.४६. 'हे माझे गुरूच माझ्या भक्तीची परीक्षा घ्यायला रूप पालटून आले' असा मनाशी निश्चय करून त्या त्वष्ट्याने त्याप्रमाणे सर्व यात्रा यथासांग केल्या.४७.

**चरित्वा क्षेत्रयात्रां स लिङ्गं संस्थापयत्तदा । विश्वेशो दर्शयित्वा स्वं रूपं प्रीतोऽब्रवीदिदम् ।।४८।।**
**वत्स वत्स पवित्रोऽसि गुरुभक्त्या विशुद्धया । धन्योऽस्यनुगृहीतोऽसि वृणीष्वाभीप्सितं वरम् ।।४९।।**
**शिष्योऽपि गुरुतत्पत्नी-पुत्रोक्तीस्तं तथाब्रवीत् । कलाविद्यापटुर्भूत्वा ज्ञानविज्ञानवानिह ।।५०।।**
**प्रसार्य क्वापि चातुर्यं लोकख्यातो भविष्यसि । इत्युक्त्वान्तर्दधे विश्वेट् ततः सोऽप्यायययौ गुरुम् ।।५१।।**
**याचिताखिलवस्तूनि श्रीविश्वेशप्रसादतः । निर्मायादात्कृती तेन गुरुस्तुष्टस्तमब्रवीत् ।।५२।।**

सः क्षेत्रयात्रां चरित्वा लिङ्गं संस्थापयत्। तदा विश्वेशः प्रीतः तं स्वं रूपं दर्शयित्वा इदं अब्रवीत्।४८। 'हे' वत्स, वत्स, विशुद्धया गुरुभक्त्या पवित्रः असि, धन्यः असि, अनुगृहीतः असि, अभीप्सितं वरं वृणीष्व।४९। शिष्यः अपि गुरु+तत्+पत्नी+पुत्र+उक्तीः तथा अब्रवीत्। 'इह कला+विद्या+पटुः, ज्ञान+विज्ञान+वान् भूत्वा,।५०। क्व अपि चातुर्यं प्रसार्य, लोकख्यातः भविष्यसि' इति उक्त्वा विश्वेट् अन्तर्दधे। ततः सः अपि गुरुं आययौ।५१। कृती श्रीविश्वेश+प्रसादतः याचित+अखिल+वस्तूनि निर्माय अदात्। तेन तुष्टः गुरुः तं अब्रवीत्।५२।

संपूर्ण क्षेत्रयात्रा करून झाल्यावर त्याने आपल्या नावाने शिवलिंगाची स्थापना केली. तेव्हा प्रत्यक्ष विश्वेश्वर प्रसन्न होऊन त्याच्यापुढे प्रकटले आणि म्हणाले,(४८) 'बाळा रे बाळा! अत्यंत शुद्ध गुरुभक्तीने तू पवित्र झाला आहेस, तू धन्य आहेस. तुझ्यावर माझा अनुग्रह आहे. तुला हवा असलेला वर तू मागून घे.'४९. शिष्यानेही त्यांना आपले गुरू, त्यांची पत्नी, पुत्र आणि कन्या यांच्या मागण्या निवेदन केल्या. तेव्हा भगवान विश्वनाथ म्हणाले, 'तू चौसष्ट कला, चौदा विद्या यात प्रवीण होशील. लौकिक आणि पारमार्थिक ज्ञानाने संपन्न होशील. भूलोकातच काय पण कुठेही स्वर्गात वा पाताळातही तू तुझ्या चातुर्याचा प्रभाव पसरवशील. तू सर्व लोकांत प्रसिद्ध होशील.' एवढे बोलून भगवान अदृश्य झाले. तो शिष्य गुरूंच्या घरी परतला.५०. अशा कृतकृत्य झालेल्या शिष्याने काशीविश्वेश्वराच्या प्रसादाने त्यांच्या सर्व मागण्यांप्रमाणे वस्तू निर्माण करून त्यांना अर्पण केल्या. त्यामुळे प्रसन्न झालेले गुरू त्याला म्हणाले.५२.

**भूत्वा ज्योतींषि यावत्त्वं चिरजीवी प्रसार्य सत् । चातुर्यं सर्वलोकेषु त्वं स्रष्टेवापरो भव ।।५३।।**
**तव सर्वर्धिनिधयो वशाश्चिंताव्यथादिकाः । न स्पृशन्ति कदापि त्वां प्रसादोऽयं मम ध्रुवः ।।५४।।**
**ततः प्रस्थापयामास तं स्वस्थानमुपेत्य सः । भूत्वा गुरूक्तवद्धयास्ते श्रीमंस्त्वष्टाखिलश्रुतः ।।५५।।**
**इति गौर्यै शिवेनोक्तं सेवातत्त्वं त्विदं गुरोः । तदुक्ताचरणं भक्त्या सर्वभावात्तदर्चनम् ।।५६।।**
**एतावदुक्त्वा विरते गुरौ द्विजो नत्वाब्रवीदद्य विचित्रमीक्षितम् ।**
**काशीपुरं वै भवता सहाखिलं यद्यत्समाख्यातमवेक्षितं समम् ।।५७।।**

'यावत् ज्योतींषि चिरजीवी त्वं सर्व+लोकेषु चातुर्यं प्रसार्य सत् त्वं अपरः स्रष्टा एव भव।५३। तव सर्व+ऋद्धि+निधयः वशाः। चिंता+व्यथा+आदिकाः त्वां कदा अपि न स्पृशन्ति। अयं मम ध्रुवः प्रसादः।५४। ततः तं प्रस्थापयामास। सः स्व+स्थानं उपेत्य गुरु+उक्तवत् भूत्वा श्रीमन् त्वष्टा अखिलश्रुतः आस्ते।'५५। इति गौर्ये शिवेन उक्तं इदं गुरोः सेवा+तत्त्वं तु तत्+उक्त+आचरणं, भक्त्या सर्व+भावात् तत् अर्चनम्।५६। एतावत् उक्त्वा गुरौ विरते द्विजः नत्वा अब्रवीत्। 'अद्य विचित्रं ईक्षितम्। भवता सह अखिलं काशीपुरं, यत् यत् समाख्यातं समं अवेक्षितम्।५७।

'तू आचंद्रसूर्य चिरंजीव होशील. त्रैलोक्यात आपल्या कौशल्याची छाप टाकून तू प्रतिब्रह्मदेवच होशील.५३. सर्व ऋद्धी, सिद्धी आणि निधी तुला वश होतील. चिंता, व्यथा आदि तुला शिवणारही नाहीत. हा माझा तुला शाश्वत प्रसाद आहे.'५४. असे बोलून गुरूंनी त्याला निरोप दिला. आपल्या स्थानी येऊन तो गुरूंच्या आशीर्वादाप्रमाणे सर्व सिद्धी पावला. त्वष्टा आजही श्रीमान् आणि सर्व लोकांत प्रख्यात आहे.५५. पार्वतीमातेला शंकरांनी सांगिलेले गुरुसेवेचे तत्त्व हेच आहे की, त्यांच्या वचनाचे पालन करून भक्तीभावाने सर्व प्रकारे त्यांचे पूजन करावे.५६. एवढे सांगून श्रीगुरू शांत राहिले. तेव्हा सायंदेव वंदन करून त्यांना म्हणाला, 'आज मी चमत्कार पाहिला! आपल्यासह मी सगळी काशी पाहिली. आपण जे जे सांगत होता ते ते सर्व मी प्रत्यक्ष पाहिले. खरोखर, कुठे काशी, कुठे मी आणि तसेच कुठे आपण? सर्व कांही पूर्वी न पाहिलेले आपण मला दाखविले!५७.

**क्वाहं क्व काशी क्व भवांस्तथापि वा अदृष्टपूर्वं सकलं प्रदर्शितम् ।**
**न त्वं नरो नासि सुरो न चेतरो नूनं परात्मैव परावरोऽस्यजः ।।५८।।**
**प्राग्ब्रह्म त्वमजोऽक्रियोऽपि बहुलं स्यामित्यभूद्धीस्तया । सृष्ट्वैवाण्डभुवं ततो जगदिदं सृष्टं सधर्मं गुणैः ।।**
**स्वैः स्वं भो रमयन्विहंसि सदरीनत्रावतीर्यानिशं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।५९।।**

क्व अहं? क्व काशी? क्व भवान् तथा अपि वा? सकलं अदृष्टपूर्वं प्रदर्शितम्! त्वं न नरः, न सुरः न च इतरः असि। नूनं पर+अवरः अजः परात्मा एव असि।'५८। प्राक् त्वं ब्रह्म अजः अक्रियः अपि बहुलं स्याम् इति धीः अभूत्। तया अण्ड+भुवं सृष्ट्वा ततः स्वैः गुणैः इदं जगत् सधर्मं सृष्टम्। स्वं रमयन् अत्र अवतीर्य अनिशं सत्+अरीन् विहंसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्री+पद+अब्ज+द्वयं वन्दे।५९।

आपण ना मनुष्य आहात, ना देव, ना आणखी कुणी! आपण ब्रह्मादिकांहून श्रेष्ठ आहात. जन्मादिविकाररहित साक्षात् परमात्माच आपण आहांत!'५८. असे बोलून त्या सायंदेवाने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. हे शार्दूलविक्रीडित वृत्तांतील अष्टक आहे. जगाची उत्पत्ती होण्यापूर्वी नित्य, शुद्ध, बुद्ध ह्या लक्षणांनी जाणले जाणारे ब्रह्म अविकारी आणि निष्क्रिय होते. त्याचा 'मी एक आहे तो बहुल (अनेक) व्हावा,' असा संकल्प झाला. आत्मा एकमेवाद्वितीय आहे. त्याला बहुलत्व कसे येणार? आत्म्यावेगळी अशी कोणतीच वस्तू असूच शकत नाही. आत्म्याचे अनेकत्व हे आकाशाच्या अनेकत्वा प्रमाणे जाणावे. आकाश एकच आहे. पण घट, मठ आदींना व्यापून ते घटाकाश, मठाकाश, महदाकाश अशा नावांनी ओळखळे जाते. म्हणजे त्याचे अनेकत्व वस्तुसापेक्ष आहे. तसेच आत्म्याचे अनेकत्वही वस्तुसापेक्षच आहे. सृष्टीतील सर्व पदार्थ सर्व अवस्थात ब्रह्मात्मकच असतात. ब्रह्मावाचून कोणत्याही वस्तूला अस्तित्व असूच शकत नाही. ब्रह्म मात्र त्या वस्तूच्या पलीकडे असते.

अनेक होण्याचा संकल्प म्हणजेच मूळमाया किंवा प्रकृती. तिच्याद्वाराच ब्रह्मदेव झाले आणि त्यांच्यापासून हे आपल्या गुणधर्मासहित जगत् उद्भवले. हे सद्गुरो, आपल्या स्वरूपापासूनच आपण कल्पिलेल्या ह्या मायामय त्रिगुणात्मक पाचभौतिक सृष्टीत अवतरून (मायेचा स्वेच्छेने अंगीकार करून) आपण सतत दुष्टांचे निर्दालन करता.

**कल्याकृष्टहृदुझ्झितक्रतुनर-त्रस्ताध्वराशीर्मुदे । प्रातः सूर्य इवोदितोऽस्यज महामोहान्धकारं ग्रसन् ।।**
**सद्धर्माश्रमसेतुमत्र शिथिलप्रायं सुदार्ढ्यं नयन् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६०।।**
**सर्वानन्दनिधानरूपममलं स त्वं सुखं मूर्तिमत् । प्रादुष्कृत्य जनत्रयान्तरमृग-क्रीडावनं पावनम् ।।**
**संसारावटमग्नमुद्धरसि भो स्वीकृत्य तुर्याश्रमम् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६१।।**

कलि+आकृष्ट+हृत्+उझ्झित+क्रतु+नर+त्रस्त अध्वर+आशीः मुदे, (हे) अज, मोह+अन्धकारं ग्रसन् प्रातः सूर्य इव उदितः असि। अत्र शिथिल+प्रायं सत्+धर्म+आश्रम+सेतुं सुदार्ढ्यं नयन् (वर्तसे)। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६०। (भो) सर्व+आनन्द+निधान, स त्वं मूर्तिमत् सुखं जन+त्रय+अन्तर+मृग+क्रीडा+वनं पावनं प्रादुष्कृत्य तुर्याश्रमं स्वीकृत्य संसार+अवट+मग्नं उद्धरसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६१।

हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. या अष्टकाची टीका लिहिताना प्रत्येक श्लोकाच्या टीकेनंतर त्याचा भावार्थ दर्शविणारा एक सुगम अनुष्टुभ् श्लोक दिला आहे. *बहु स्यामिति संकल्प्य स आद्योऽभूज्जगत्स्वयं। श्रीदत्तः शिक्षयन्दुष्टान्रमते स्वात्मना स्वयं।।१।।५९.*

अधर्माचा मित्र असलेल्या कलीकडे चित्त आकर्षिल्यामुळे मनुष्यांनी यज्ञ (विहित कर्म आणि उपासना) टाकल्याने त्रस्त झालेल्या देवतांच्या संतोषासाठी, तसेच मूल अज्ञानरूपी महामोहाचा अंधार (तम) नष्ट करण्यासाठी, आपण प्रातःकाळच्या सूर्यासारखे प्रकट झाला आहात. वर्णाश्रमधर्माची विस्कटलेली घडी बसविण्यासाठी अवतरलेल्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *नरैस्त्यक्तेषु यागेषु कलिदोषहतैरिह। देवानन्दप्रदो दत्तोऽवतीर्णो धर्मभावनः।।२।।*६०. सर्व परमानन्दाचे आगर, सुखाची गाळीव मूर्ती, मुक्त, मुमुक्षू आणि बद्ध अशा त्रिविध जनांच्या मानसरूपी मृगांचे क्रीडावन असलेले संन्यासाश्रमाश्रित पावन रूप धरून संसारगर्तेत बुडणाऱ्या जीवांचा उद्धार करणाऱ्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *सर्वानन्दनिधिर्भूत्वा यतिर्दत्तो जगत्त्रयं। पावयन्नमलो भक्तानुद्धरत्यतिकष्टतः।।३।।*६१.

**मूके गां दृशमन्धके सुतनयं वन्ध्यासु चासून्मृते । सौभाग्यं विधवासु पल्लवमहो दत्तं सुशुष्केन्धने ।।**
**एवंभूत इयान्तवैष महिमा त्रैलोक्यसंस्थाक्षमो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६२।।**
**मुक्तावास मुमुक्षुकल्पविटपिन् भो कामिनां कामधुग् । दारिद्रानलमेघ दुष्कृतदवाग्रे तापिताराम ते ।।**
**श्रुत्यन्विष्टरजःपदं श्रुतविवादातीततत्त्वं महत् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६३।।**

मूके गां, अन्धके दृशं, वन्ध्यासु सुतनयं, मृते असून्, विधवासु सौभाग्यं, सशुष्क+इन्धने पल्लवं दत्तम्। एवंभूत इयान् तव एष त्रैलोक्य+संस्था+क्षमः महिमा। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वर श्रीपद+अब्ज+द्वयं वन्दे।६२। भो मुक्त+आवास, मुमुक्ष+कल्प+विटपिन्, कामिनां काम+धुक्, दारिद्र+अनल+मेघ, दुष्कृत+दव+अग्रे, तापित+आराम, ते श्रुति+अन्विष्ट+रजःपदं श्रुत+विवाद+अतीत+तत्त्वं महत्। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६३।

मुक्याला वाचा, आंधळ्याला दृष्टी, वंध्येला सुपुत्र, प्रेताला प्राण, शुष्क लाकडाला पालवी देणारे आपले सामर्थ्य तर आहेच; पण त्रैलोक्याचीही स्थापना करणे आपल्याला खेळ आहे. (**अक्षमः** म्हणजे अधिक सक्षम असा अर्थ टीकेत दिला आहे.) हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *मूकाय वाचं दृशमन्धकाय ददौ वशायै तनयं मृताय। प्राणान्सुभागं च गताधवायै शुष्कद्रुमं पल्लवयन्हि दत्तः।।४।।*६२. वर *त्रिविधजनक्रीडावन* असे म्हटले त्याचे अधिक स्पष्टीकरण या श्लोकात आहे. '*निर्दोषं हि परं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः*' या भगवद्वचनानुसार (५:१९) आपण मुक्तांचे निवास्थान आहांत. मुमुक्षूंना सद्गुरुप्राप्ती, साधनमार्ग, चित्तशुद्धी, अंतरायांचा निरास, मोक्षप्राप्तीची साधने इत्यादि पुरविणारे कल्पवृक्ष आपण आहात. बहिर्मुख भक्ताच्या कामना पुरविणारी कामधेनूही आपणच आहात. दारिद्र्यरूपी अग्नीचे शामक मेघ आपणच आहात. पातकांचे वन जाळणारे दावाग्नी आपणच आहात. संसाराच्या तापांनी पोळलेल्या जीवांचा आरामही आपणच आहात. वेदही आपल्या चरणधूलीचा मागोवा घेत आहेत. मात्र आपले व्यापक पद शास्त्रांच्या विवादापलीकडे आहे. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *चिंतामणिरिवाभाति भक्तानां भक्तियोगतः। शाास्त्रवादव्यतीतात्मा श्रीदत्तो भगवान्स्वयं।।५।।*६३.

**भो योगीश्वरभावितं तव पदं तीर्थाश्रयं सज्जना- । जीवं कामिसुदैवतं च कमलालीलास्थलं निर्मलम् ।।**
**विद्वद्वादकरण्डकं सुकृतसंस्थानं महत्पावनं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६४।।**
**वेदागोचर ते चरित्रममलं शक्तोऽत्र कः कृत्स्नशो । वक्तुं वह्न्यबिनेन्दुभूखपवनात्मेतीह मूर्त्यष्टकम् ।।**
**एतद्विश्वमयं न चान्यदिह वा ॐकाररूपेशितर्- । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६५।।**

भो, तव पदं योगि+ईश्वर+भावितं, तीर्थ+आश्रयं, सज्जन+आजीवं, कामि+सुदैवतं, कमला+लीला+स्थलं, निर्मलं, विद्वत्+वाद+करण्डकं, सुकृत+संस्थानं, महत् पावनं (अस्ति)। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६४। (हे) वेद+अगोचर, अत्र ते अमलं चरित्रं कृत्स्नशः वक्तुं कः शक्तः? हे ॐकार+रूप ईशितः वह्नि+अप्+इन+इन्दु+भू+ख+पवन+आत्मा इति इह मूर्ति+अष्टकं एतत् अयं विश्वम्। न च अन्यत् वै। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे।६५।

ते पद अनेकांच्या बुद्धीचा विषय कसे झाले आहे ते सांगतात. याज्ञवल्क्यादि योगीश्वरांनी चिंतिलेले आपले पद आहे. गंगादि तीर्थांचा आपण आश्रय. गंगा तर आपल्याच चरणापासून निःसृत झाली आहे. नारायणोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार आपल्या चरणांनी पवित्र झालेली तीर्थे महापाप्यांनासुद्धा तारतात. संतसज्जनांना तर आपले पद जीविकाभूत आहे. कामी जनांचे ते उत्तम दैवत आहे. लक्ष्मीचे ते विलासस्थान आहे. पापहारी आपले महान् पद विद्वानांच्या वादरूपी रत्नांची मंजूषा आहे. पुण्यार्जनाचे ते क्षेत्र आहे. *योगीचिंतितं लोकपावनं यत्पदं महत्। कामदं श्रीनिवासं च स दत्तः पुण्यशास्त्रभूः।।६।।*६४. (उपनिषदांव्यतिरिक्त) वेदांनाही अगम्य असणाऱ्या आपल्या पावक चरित्राचे वर्णन संपूर्णतया करण्याचे कुणाचे सामर्थ्य आहे? हे ॐकारस्वरूप ईश्वरा, अग्नी, जल, सूर्य, चंद्र, भूमी, आकाश, वायू आणि जीवात्मा ह्या आपल्या अष्टमूर्तींचेच हे जग बनलेले आहे. ह्या अष्टकाव्यतिरिक्त वेगळे असे इथे कुठेच कांहीच नाही. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *आत्माप्युपनिषद्वेद्यो यल्लीलां कोऽपि वेद नो। जगन्मयाष्टमूर्त्यात्मा स दत्तः प्रभवात्मकः।।७।।*६५.

**कुण्डीदण्डकरं प्रशान्तममलं संन्यासिरूपं तव । श्रीभीमामरजायुतिस्थितमज ध्येयं शरण्यं मयि ।।**
**ज्ञानं तारकमीश सत्यमनिशं ब्रह्मन्स्थिरीकुर्वदो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६६।।**
**एवं स्तुवन्तं प्रभुराह तेऽर्पिता । तुष्टेन भक्तिर्मयि खल्वहैतुकी ।**
**भो पुत्रपौत्रादिसमस्तवंशजा । भक्ता भविष्यन्ति ममैव निश्चितम् ।।६७।।**
**इतःपरं म्लेच्छनिषेवणं जहि । स्त्रिया सुतैश्चात्र सदैव तिष्ठ भोः ।**
**द्विजोऽपि गत्वा गृहमानयत्स्त्रियं । सुतांश्च तुष्टाव जगद्गुरुं पुनः ।।६८।।**

(हे) अज, ईश, तव अदः कुण्डी+दण्ड+करं प्रशान्तं अमलं श्रीभीमा+अमरजा+स्थितं ध्येयं, शरण्यं, ज्ञानं, तारकं, सत्यं मयि अनिशं स्थिरीकुरु। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे ।६६। एवं स्तुवन्तं प्रभुः आह, 'भो, (मया) तुष्टेन त्वयि अहैतुकी भक्तिः अर्पिता खलु। पुत्र+पौत्र+आदि समस्त+वंशजाः निश्चितं मम एव भक्ताः भविष्यन्ति।६७। इतः परं म्लेच्छ+निषेवणं जहि। भोः स्त्रिया सुतैः च अत्र एव सदैव तिष्ठ।' द्विजः अपि गृहं गत्वा स्त्रियं सुतान् च आनयत् पुनः जगत्+गुरुं तुष्टाव।६८।

परब्रह्मस्वरूप ईश्वरा, आपले दंड आणि कमंडलू धारण केलेले, ध्यानयोग्य, शरण्य, प्रशांत, ज्ञानमय भीमा-अमरजासंगमनिवासी यतिरूप नित्य माझ्या हृदयांत स्थिर करा. *संन्यासिरूपो श्रीदत्तो धृतदण्डकमण्डलुः। गन्धर्वस्थः सच्चिदात्मा सदा तिष्ठतु मे हृदि।।८।।*६६.

अशा प्रकारे स्तवन करणाऱ्या सांयदेवाला श्रीगुरू म्हणाले, 'सायंदेवा! मी तुझ्यावर प्रसन्न होऊन तुला निर्हेतुक (*मोक्षैकफला*) भक्ती प्रदान केली आहे. तुझे पुत्र, नातू आदि सर्व वंशज माझेच भक्त होतील.६७. यापुढे तू यवनांची चाकरी सोडून दे. तुझ्या बायकामुलांना घेऊन येऊन तू इथे गाणगापुरातच कायम राहा.' सायंदेवही कडगंचीला जाऊन आपल्या कुटुंबियांना घेऊन आला आणि पुनः त्याने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'हे ईश्वरा ! वाच्य (रूप) आणि वाचक (नाम) या नात्याने तू जगताला व्यापले आहेस.

**त्वं वाच्यवाचकतयेश जगन्मयो वा । ॐकारवाच्य भगवन् त्रिगुणात्मकोऽसि ।**
**आद्यन्तवर्जित पुराकृतभागधेयाद् । दृष्टं त्विदन्तव परात्परसत्त्वरूपम् ।।६९।।**
**पापोऽपि पूतोऽस्मि तवाङ्घ्रिसंश्रयात् । स्पर्शाश्रयाल्लोहमपीव काञ्चनम् ।**
**तप्तोऽपि शान्तोऽस्मि मुखेन्दुदर्शनाद् । दीनोऽपि धन्योऽस्मि तव प्रसादतः ।।७०।।**

‘(हे) वाच्य+वाचकतया ईशः जगत्+मयः (हे) ॐकारवाच्य भगवन् त्रिगुण+आत्मकः असि। (हे) आदि+अन्त+वर्जित, पुरा+कृत+भागधेयात् इदं तव परात्पर+सत्त्व+रूपं दृष्टम्।६९। (अहं) पापः अपि तव अङ्घ्रि+संश्रयात् स्पर्श+आश्रयात् लोहं अपि काञ्चनं इव, पूतः अस्मि। मुख+इन्दु+दर्शनात् तप्तः अपि शान्तः अस्मि। दीनः अपि तव प्रसादतः धन्यः अस्मि।’७०।

पतंजलींच्या सूत्रानुसार (१:२७) ॐकार ज्याचे वाचक आहे अशा भगवंता, आपण त्रिगुणांचे ईश्वर आहां.’ ‘हेच एक अक्षर ब्रह्म आहे,’ (कठ उ. १:२:१६) ‘हेच श्रेष्ठ आलंबन आहे,’ (१:२:१७), ‘पर आणि अपर ब्रह्म म्हणजेच ॐकार’ (प्रश्न उ. ५:२) इत्यादि श्रुतींनी वाच्य ब्रह्म आणि त्याचा वाचक ॐकार यांची एकरूपता प्रतिपादलेली आहे. त्याकरिता सायंदेव श्रीगुरूंना जगन्मय म्हणत आहे. नाम आणि नामी यांच्यांत भेद नसल्याने तसेच ॐकार हा ब्रह्माचा विर्वत आहे आणि ब्रह्म ॐकाराचे अधिष्ठान आहे. सांयदेव पुढे म्हणतात, ‘आदि आणि अंत रहित देवा, माझ्या पूर्वपुण्याईने आपल्या ह्या श्रेष्ठातिश्रेष्ठ सत्त्वस्थ रूपाचे मला दर्शन होत आहे.६९. मी पापी असलो तरी, परीसाला लागून लोखंडाचेही सोने व्हावे तसा आपल्या चरणस्पर्शाने मी पवित्र झालो आहे. त्रिविध तापांनी पोळलेला असूनही आपल्या मुखचंद्राच्या दर्शनाने मी शांत झालो आहे. दीन असूनही मी आपल्या कृपाप्रसादाने धन्य झालो आहे.’७०.

**स्तुत्वैवं श्रीगुरुं हृष्टः कारनाटकभाषया । आवतारकथोद्धातं जगौ तस्य यथाक्रमम् ।।७१।।**
**भगवान्तेन तुष्टः सन् दत्वेष्टं वरमाह तम् । अयं ज्येष्ठसुतो मान्यो धन्यस्ते मेऽतिवल्लभः।।७२।।**
**इत्युक्त्वा नागनाथस्य मूर्ध्न्यधाच्छंकरं करम् । तदैव गीष्पतिसमो वक्ता ज्ञाता बभूव सः ।।७३।।**
**सद्गुरुः प्राह विप्रं ते भार्येयं सुभगा सती । चतुरश्चतुरान्पुत्रान् लभेत्त्वमपि भाग्यभाक् ।।७४।।**
**इतः परं म्लेच्छलब्ध-वृत्तिं हित्वा कुटुम्बयुक् । तिष्ठात्रैव तव श्रेयो भवेन्मे सुप्रसादतः ।।७५।।**
**स्नात्वा स्वकैः सह तिथौ भाद्रशुद्धचतुर्दशे । अनन्तव्रतमस्त्यद्य तारकं तत्त्वमाचर ।।७६।।**

एवं श्रीगुरुं स्तुत्वा हृष्टः कारनाटक+भाषया तस्य आवतार+कथा+उद्धातं यथा+क्रमं जगौ।७१। भगवान् तेन तुष्टः सन् तं इष्टं वरं दत्वा आह। 'अयं ज्येष्ठसुतः मान्यः धन्यः मे अतिवल्लभः।'७२। इति उक्त्वा नागनाथस्य मूर्ध्नि शंकरं करं अधात्। सः तदा एव गीष्पतिसमः वक्ता ज्ञाता बभूव।७३। सद्गुरुः विप्रं प्राह, 'इयं ते सुभगा सती भार्या चतुरः चतुरान् पुत्रान् लभेत्। त्वं अपि भाग्यभाक्।७४। इतः म्लेच्छ+लब्धवृत्तिं हित्वा कुटुम्ब+युक् अत्र एव तिष्ठ। मे सुप्रसादतः तव श्रेयः भवेत्।७५। स्वकैः स्नात्वा अद्य भाद्रशुद्धचतुर्दशे तिथौ तारकं अनन्तव्रतं अस्ति, तत् त्वं आचर।'७६।

अशा रीतीने श्रीगुरूंची स्तुती करून हर्षोत्फुल्ल चित्ताने सायंदेवाने श्रीगुरूंच्या अवतारांतील लीला कर्नाटक भाषेत क्रमशः गायल्या.७१. सायंदेव वेदज्ञ ब्राह्मण असूनही वेदांतील सूक्ते किंवा पुराणातील स्तोत्रे यांनी स्तुती न करता त्याने कानडी भाषेचा का उपयोग केला? आणि देवालाही ते कसे आवडले असे कुणी म्हणेल. **पूजादि विधीत वैदिक मंत्रांची अपेक्षा आहे. ईश्वरस्तवन मात्र आपापल्या अधिकारानुसार करावे.** त्याला कांही प्रत्यवाय नाही. उलट ईश्वराची प्रसन्नताच लाभते. कारण ईश्वराला प्रेमाची आवड असते. तो भक्तीनेच प्रसन्न होतो.

श्रीगुरू भगवान् प्रसन्न झाले आणि सायंदेवाला इष्ट वर देऊन म्हणाले, 'हा तुझा वडील मुलगा धन्य आहे. तो सर्वमान्य होईल. हा मला अतिशय प्रिय आहे.'७२. असे म्हणून त्यांनी त्या नागनाथाच्या मस्तकावर हात ठेवला. तो तत्क्षणीच बृहस्पतीसमान वक्ता आणि ज्ञाता झाला.७३.

**धर्मः कृष्णोपदेशेन चरित्वा यद्व्रतं महत् । दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वागात्सतनुर्दिवम् ।।७७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भवान्देवोऽस्ति नोऽनन्तो भवत्सेवाव्रतं परम् । तथापि श्रोतुमिच्छामि को धर्मः कीदृशं व्रतम् ।।७८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धर्मोऽभूत्पाण्डवो राजा तत्सदस्यां सुयोधनः । मायाभ्रान्त्यापतन्मानी व्रीडितो जनहास्यतः ।।७९।।**

'धर्मः यत् महत् व्रतं कृष्ण+उपदेशेन चरित्वा दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वा सतनुः दिवं अगात्।'७७। सायंदेव उवाच। 'भवान् नः देवः अस्ति। भवत्+सेवा परं व्रतं (चि अस्ति)। तथापि (अहं) कः धर्मः, कीदृशं व्रतं, श्रोतुं इच्छामि।'७८। श्रीगुरुः उवाच। 'धर्मः पाण्डवः राजा अभूत्। तत् सदस्यां मानी सुयोधनः माया+भ्रान्त्या अपतत्। जन+हास्यतः व्रीडितः।७९।

सद्गुरू सायंदेवाला म्हणाले, 'ही तुझी भाग्यवती आणि पतिव्रता स्त्री चार बुद्धिमान् पुत्रांची आई होईल. तूसुद्धा भाग्यशाली आहेस.७४. यापुढे उपजीवेकेसाठी यवनांची सेवा करू नकोस. तू तुझ्या कुटुंबासह इथे गाणगापुरातच राहा. माझ्या प्रसादाने तुझे कल्याण होईल. ७५.आज भाद्रपद शुद्ध चतुर्दशी आहे. तरी तू आपल्या परिवारासह स्नानादि करून तारक अशा अनंतव्रताचे आचरण कर.'७६. धर्मराजाने श्रीकृष्णाच्या उपदेशाने हे महान् व्रत केले. त्याच्या प्रभावाने दिव्य सौख्याचा आणि सार्वभौम राज्याचा उपभोग घेऊन सदेह स्वर्गाला गेला.७७. सायंदेवांनी विचारले, 'आमचे तर आपणच देव आहात आणि आपली सेवा हेच आमचे परम व्रत आहे. तरीही मला हे जाणण्याची इच्छा आहे की हा धर्मराजा कोण? आणि हे व्रत कसे करतात?'७८. श्रीगुरू उत्तरले, 'धर्म पण्डूचा पुत्र राजा होता. एकदा त्याच्या मयासुराने निर्मिलेल्या सभेत दुर्योधन मायेच्या भुलीने पाण्याला भूमी, भूमीला पाणी, दाराला भिंत आणि भिंतीला दार समजून पडला. तेव्हा झालेला उपहास मानी सुयोधनाच्या जिव्हारी लागला.७९.

**जित्वा द्यूतमिषाद्धर्मं हृततच्छ्रीः स सानुजम् । वनाय प्रेरयत्सोऽपि तत्र गत्वा सुदुःखितः ॥८०॥**
**स एकदागतं कृष्णं नत्वा सस्त्र्यनुजोऽब्रवीत् । त्वन्नस्त्रातेति बिरुदं वहन्नोऽकं न वेत्सि किम् ॥८१॥**

**॥ श्रीकृष्ण उवाच ॥**

**बलवद्दैवमपि मां भजतां नेक्षते सदा । त्वं मद्भक्तोऽपि मद्वाक्यात् कुर्वनन्तव्रतं महत् ॥८२॥**
**कोऽनन्तस्तद्व्रतं कीदृक् पुरा केन कृतं वद । इति धर्मानुयोगं स श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे ॥८३॥**

सः द्यूत+मिषात् धर्मं स+अनुजं जित्वा हृत+तत्+श्रीः वनाय प्रेरयत्। सः अपि तत्र सुदुःखितः।८०। सः एकदा आगतं कृष्णं स+स्त्री+अनुजः नत्वा अब्रवीत्। त्वं नः त्राता इति बिरुदं वहन् नः अकं न वेत्सि किम्?'८१। श्रीकृष्ण उवाच। 'सदा मां भजतां बलवत् दैवं अपि न ईक्षते। (तथा) अपि त्वं मत् भक्तः। मत् वाक्यात् महत् अनन्तव्रतं कुरु।'८२। 'कः अनन्तः? कीदृक् व्रतं?' इति धर्म+अनुयोगं श्रुत्वा सः वक्तुं प्रचक्रमे।८३।

त्याने धर्मराजाला कपटद्यूताने हरवले आणि त्याचे राज्य आणि संपत्ती हिरावून घेऊन त्याला बंधूंसहित बारा वर्षांच्या वनवासाला पाठविले.८०. तेव्हा तिथे वनवासाचे कष्ट भोगणाऱ्या पांडवांना भेटायला श्रीकृष्ण आले असता धर्मराजाने त्याला आपल्या बांधवांसहित नमस्कार केला आणि त्याला विचारले, 'अरे कृष्णा पांडवांचा कैवारी अशी बिरुदावली मिरवतोस; पण तुला आमचे दुःख दिसत नाही का?'८१. श्रीकृष्ण म्हणाले, 'जो निरंतर निर्विकल्प स्थितीत माझ्या भजनात निमग्न असतो त्याच्याकडे दैव कितीही बलवत्तर असले तरी पाहातसुद्धा नाही. कारण दैवाची प्रतिकूलता जाणवण्यासाठी देहतादात्म्य असावे लागते. 'ज्यांचे वासनाजाल निःशेष लय पावले आहे आणि ज्यांच्या पापपुण्यांचा सांठा मुळासह उखडलेला आहे' (पंचदशी १:६१) त्यांच्याकडे दैवाचा दृष्टिक्षेपही होत नाही. अरे, युधिष्ठिरा, तुझी सध्या ती अवस्था नसली तरी तू माझा भक्तच आहेस. तरी तू माझ्या सांगण्यानुसार महान अशा अनंतव्रताचे अनुष्ठान कर.८२. धर्मराजाने विचारले, 'कोण हा अनंत? आणि त्याचे व्रत कसे करावयाचे?' तेव्हा श्रीकृष्णांनी उत्तर दिले.८३.

**चराचरजगत्काल-भूताद्यात्माप्यहं विभुः । कर्मप्रयोजनगुणैर्भूपानन्तोऽस्म्यहं पृथक् ।।८४।।**
**भाद्रशुक्लचतुर्दश्यामनन्तव्रतमुत्तमम् । व्रतिनोऽनन्तफलदं तत्कुर्विष्टमवाप्स्यसि ।।८५।।**
**ऋषिः सुमन्तुः प्रागासीद् वासिष्ठो गौतमीपतिः । तत्स्त्रीः कन्यां प्रसूयैकां मृतान्योद्वाहितामुना ।।८६।।**
**सा दुःशीला कलिद्वेष-प्रिया चण्डी पतिं सुताम् । क्रूरा तौ त्रासयामास कन्यापि ववृधे शुभा ।।८७।।**

'(हे) भूप, अहं विभुः कर्म+प्रयोजन+गुणैः चर+अचर+जगत्+काल+भूत+आदि+आत्मा अपि अहं पृथक् अनन्तः अस्मि।८४। उत्तमं अनन्तव्रतं भाद्र+शुक्ल+चतुर्दश्यां व्रतितं अनन्त+फलदम्। तत् कुरु, इष्टं अवाप्स्यसि।८५। प्राक् सुमन्तुः वासिष्ठः ऋषिः गौतमी+पतिः आसीत्। तत् स्त्रीः एकां कन्यां प्रसूय मृता। अमुना अन्या उद्वाहिता।८६। सा दुःशीला कलि+द्वेष+प्रिया चण्डी क्रूरा तौ पतिं सुतां त्रासयामास। शुभा कन्या अपि ववृधे।८७।

'माझ्या व्यापकत्वाने हे सर्व चराचर जगत्, काल, सर्व जीव इत्यादि मीच झालो आहे. कर्म, प्रयोजन, गुण वगैरेंनी मीच हे सर्व करूनसुद्धा मी वेगळाच आहे. पुरुषसूक्तांत (ऋग्वेद संहिता १०:९०:३) म्हणाल्याप्रमाणे ह्या सर्वापेक्षाही अधिक श्रेष्ठ मी आहे. (*अतो ज्यायाँश्च पुरुषः... पादोऽस्य विश्वा भूतानि*) गीतेतही (१०:४१) माझे प्रतिपादन आह की मी माझ्या एका अंशाने हे सर्व विश्व धारण करून राहिलो आहे (*विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्।*), म्हणूनच काल, देश इत्यादि परिच्छेदरहित अनंत तो मीच आहे.'८४. 'हे उत्तम असे अनंतव्रत भाद्रपद शुक्ल चतुर्दशीला केले असता अनंत फल प्राप्त होते. ते तू कर म्हणजे तुला तुझे इष्ट प्राप्त होईल.'८५. पूर्वी सुमन्तु नावाचे एक वासिष्ठ गोत्रीय ऋषी होते. त्यांच्या पत्नीचे नाव गौतमी असे होते. तिने एका मुलीला जन्म दिला आणि ती कालवश झाली. गृहस्थाश्रमाच्या निर्वाहासाठी त्या ऋषींनी दुसरा विवाह केला.८६. ती दुष्ट, संतापी, भांडकुदळ, आकस धरणारी आणि क्रूर स्वभावाची होती. ती पतीचा आणि कन्येचाही छळ करू लागली. ती सुस्वभावी कन्या मात्र वाढू लागली.८७.

**चित्रक्रियापटुं सोऽदात् सच्छीलगुणलक्षणाम् । कौण्डिण्याय स्वगृह्योक्त-ब्राह्मोद्वाहविधानतः ।।८८।।**
**तत्र श्वशुरवात्सल्यात् स्थित्वा मासद्वयं मुनिः । श्वश्रूत्रस्तो ययौ वध्वा कौण्डिण्यः श्वशुराज्ञया ।।८९।।**
**चण्ड्यारारं दृढं बध्वा पाथेयं नार्पितं स तु । प्रादाद्बहिस्थगोधूम-पुलाकं तौ ततो गतौ ।।९०।।**
**मध्याह्ने तस्थतुर्नद्यां चिरण्टीः प्रेक्ष्य तत्र सा । गत्वार्चयन्तीः प्राहेदं युष्माभिः क्रियते किमु ।।९१।।**

सः चित्र+क्रिया+पटुं सत्+शील+गुण+लक्षणां (कन्यां) कौण्डिण्याय स्व+गृह्य+उक्त+विधानतः अदात्।८८। श्वशुर+वात्सल्यात् मुनिः तत्र मास+द्वयं स्थित्वा कोण्डिण्यः श्वश्रू+त्रस्तः वध्वा श्वशुर+आज्ञया ययौ।८९। चण्ड्या अररं दृढं बध्वा पाथेयं न अर्पितम्। सः तु बहिस्थ गोधूम+पुलाकं अदात्। ततः तौ गतौ।९०। मध्य+अह्ने नद्यां तस्थतुः। तत्र सा अर्चयन्तीः चिरण्टीः प्रेक्ष्य गत्वा प्राह, 'इदं युष्माभिः किं उ क्रियते?'९१।

त्या चित्रकलाकुशल, सुशील, गुणी आणि सुलक्षणी मुलीला सुमंतूंनी आपल्या गृह्यसूत्रानुसार ब्राह्म विवाहाने कौंडिण्य ऋषींना दिली.८८. विवाहानंतर सासऱ्यांच्या आग्रहाने मुलगी आणि जावई तिथे राहिले. पण नंतर सासूच्या छळाला कंटाळून कोंडिण्य मुनी सासऱ्यांची अनुज्ञा घेऊन तिथून सपत्नीक निघाले.८९. त्या वेळी सुमंतूच्या त्या क्रोधी पत्नीने घरातील कपाटांना कुलूपे लावून लेक-जावयांना काहीच शिदोरी दिली नाही. सुमंतू ऋषींनी बाहेर पडलेला गव्हाचा कोंडा तेवढा बांधून देऊन लेक आणि जांवई रवाना झाले.९०. दुपारच्या वेळी ते एका नदीकाठी थांबले असता त्या कन्येने तिथे कांही सुवासिनी मिळून पूजा करताना पाहिल्या. तेव्हा तिने त्यांच्याजवळ जाऊन विचारले, 'तुम्ही सर्वजणी हे काय करीत आहांत?'९१ 'हे अनंतव्रत अनंत फल देते' हा अर्थवाद आहे. चातुर्मास्याच्या फलाप्रमाणे केवळ प्रशंसा करणे हाच त्याचा उद्देश्य आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. अर्थवाद तीन प्रकारचे आहेत. वास्तव्याशी विरोध असेल तर तो गुणवाद होतो, दुसऱ्या प्रमाणांशी सुसंगत असेल तर अनुवाद होतो आणि वस्तुनिष्ठ असेल तर भूतार्थवाद होतो (*विरोधे गुणवादः स्यादनुवादोऽवधारिते। भूतार्थवादस्तद्धानादर्थवादस्त्रिधा मतः।।*). 'यूप (यज्ञस्तंभ) हा आदित्य आहे' या विधानांत सूर्याची तेजस्विता गुण यूपांत आहे असा भावार्थ आहे.

**।। स्त्रिय ऊचुः ।।**

**भाद्रशुद्धचतुर्दश्यामद्यानन्तव्रतं शृणु । स्नात्वा रक्ताम्बरं धृत्वा रक्तसूत्रे चतुर्दश ।।९२।।**
**ग्रन्थीन्बध्वा सप्तफण-दर्भशेषे निधाय तम् । कुम्भोपरि चतुर्बाहुं ध्यात्वानन्तं प्रपूज्य च ।।९३।।**

स्त्रियः ऊचुः। अद्य भाद्र+शुद्ध+चतुर्दश्यां अनन्तव्रतम्। शृणु। स्नात्वा रक्त+अम्बरं धृत्वा, रक्त+सूत्रे चतुर्दश ग्रन्थीन् बध्वा सप्त+फण+दर्भ+शेषे निधाय कुम्भ+उपरि चतुः+बाहुं अनन्तं ध्यात्वा, प्रपूज्य च,।९२-९२।

वस्तुतः यूप वेगळा आणि सूर्य वेगळा. हे गुणवादाचे उदाहरण आहे. 'अग्नी हे थंडीचे औषध आहे' ह्या विधानाची इतर प्रमाणांनी पुष्टी होते म्हणून तो अनुवाद ठरतो. भूतार्थवादांत विधानाची आणि इतर प्रमाणांची अर्थशः एकवाक्यता असते. चराचर जगताशी एकरूप असूनही त्याहून अधिक आणि वेगळे स्वरूप असणारा अनंत इथे उपास्य म्हणून प्रतिपादलेला आहे. त्यामुळे त्याची प्राप्ती ह्या फळाचे आनंत्य त्याच्याशी सुसंगत आहे. म्हणून हा भूतार्थवाद होतो. अनंत फळ याचा अर्थ एकाच वेळी सर्व कामांची पूर्णता. ही फक्त आत्मानुभवातच होते. तैत्तिरीय उपनिषदाचे (२:१:१) वचन आहे की, 'गहन अंतरांतल्या सत्य, ज्ञान, अनंत अशा ब्रह्माला जाणणाऱ्याच्या सर्व कामांची पूर्ती होते.' अज्ञानी पुरुष एकामागून एक कर्मफलांनी मिळालेली शरीरे धारण करून डोळे, कान इत्यादि उपाधींच्या माध्यमांतून, पाण्यातल्या सूर्यासारख्या जीवरूपाने त्या त्या भोगांचा अनुभव घेतो. ज्ञानी मात्र सर्व सुखभोग एकाच वेळी अनुभवतो. असे फळ अनंतव्रताने लाभत असल्याने ते अनंत व्रत आहे. चातुर्मास्याप्रमाणे केवळ प्रशंसात्मक अक्षय्य फळ नाही.

त्या स्त्रिया तिला म्हणाल्या, 'आज भाद्रपद शुक्ल चतुर्दशी असून हा अनंतव्रताचा नियत दिवस आहे. ते कसे करायचे ते ऐक. स्नान करून लाल वस्त्र परिधान करावे. मग लाल दोरकाला चौदा गाठी बांधून, तो पाण्याने भरलेल्या कलशावर ठेवलेल्या सात फणांच्या दर्भाच्या शेषावर स्थापन करावा. त्याच्यावर चतर्भुज अनंताचे ध्यान करून त्याची पूजा करावी.९२-९३.

**दत्वा चतुर्दशापूपान् ब्रह्मणे जीर्णदोरकम् । विसृज्य दत्वा नूत्नं स्वे बध्वा हस्ते च दम्पती ।।९४।।**
**संतर्प्याब्दे घटान्दद्याच् चतुर्दश चतुर्दशे । प्रत्यब्दं पूजयेद् भक्त्या वरं नातः परं व्रतम् ।।९५।।**
**कुर्वदोऽभीष्टदमपि प्रोक्त्वास्यै दोरकं ददुः । सापि तत्र व्रतं कृत्वा पतिं प्राप सदोरका ।।९६।।**
**ततो यान्तौ धनी कश्चिद् ग्रामं नीत्वा श्रियं ददौ । तत्रानन्तप्रसादात्तौ श्रीमानाढ्यौ बभूवतुः ।।९७।।**
**दोरं दृष्ट्वैकदाग्नौ स जहौ मत्वा वशीकृतिम् । श्रीदानन्तं न त्यजेति वारितोऽपि तया ऋषिः ।।९८।।**

ब्रह्मणे चतुर्दश अपूपान् दत्वा, जीर्ण+दोरकं विसृज्य दत्वा, नूत्नं स्वे हस्ते बध्वा च, दम्पती संतर्प्य,।९४। चतुर्दशे अब्दे चतुर्दश घटान् दद्यात्। प्रति+अब्दं भक्त्या पूजयेत्। अतः परं व्रतं न।९५। अभीष्ट+दं अपि इदं कुरु। इति प्रोक्त्वा अस्यै दोरकं ददुः। सा अपि तत्र व्रतं कृत्वा सदोरका पतिं प्राप।९६। ततः यान्तौ कश्चित् धनी ग्रामं नीत्वा श्रियं ददौ। तत्र तौ अनन्त+प्रसादात् श्रीमान् आढ्यौ बभूवतुः।९७। एकदां दोरं दृष्ट्वा वशी+कृतिं मत्वा सः ऋषिः, तया 'श्री+द+अनन्तं न त्यज'इति वारितः अपि, अग्नौ जहौ।९८।

त्याला चौदा अपूपांचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणाला द्यावेत. जुन्या (आधीच्या वर्षाच्या) दोरकाचे विसर्जन करून तो ब्राह्मणाला दान करावा आणि नवा पूजा केलेला दोरक हातात बांधावा. अनंताप्रीत्यर्थ एका दंपतीला भोजन घालावे.९४. असे चौदा वर्षे व्रत केल्यावर चौदा घटांचे दान करून उद्यापन करावे. यापेक्षा श्रेष्ठ व्रत नाही.९५. हे आपले अभीष्ट प्राप्त करून देणारे व्रत आहे. तूसुद्धा हे व्रत कर.' असे म्हणून त्यांनी तिलाही एक दोरक दिला. तिनेही ते व्रत केले आणि दोरक हातात बांधून पतीकडे आली. इतर व्रतात स्त्रियांना स्वातंत्र्य नसले तरी परमार्थांत मात्र त्यांना स्वातंत्र्य आहे असे इथे दिसते. अन्यथा देवाचा प्रसाद कसा होईल?९६. तिथून पुढे जात असता कुणी एका धनवान् गृहस्थाने त्यांना आपल्या गावात नेऊन खूपशी संपत्ती दिली. तिथे अनन्ताच्या कृपाप्रसादाने ते संपन्न आणि प्रतिष्ठित झाले.९७. एकदा कौंडिण्य ऋषींनी पत्नीच्या हातातला तो दोरा पाहिला आणि हा कांही वशीकरणाचा प्रकार आहे अशा समजुतीने, पत्नी 'अहो वैभव देणारा अनंत टाकू नका' अशी विनवणी करूनही त्या मुनीनी आगीत टाकून दिला.९८.

**तदाहृताग्न्यरिभ्यः श्रीस् ततोऽनन्तं स्मरन्नटन् । वनेऽनन्तः क्वेति स गो-द्रुगाः पृष्ट्वाप कश्मलम् ।।९९।।**
**तस्मै नीत्वा वृद्धविप्र-रूपेण पुरमद्भुतम् । स्वं रूपं दर्शयामास तुष्टावानन्तमप्यसौ ।।१००।।**
**जय सर्वेश्वरानन्त विश्वव्यापिन्जनार्दन । त्वन्मायामोहितधिया कृतान्मन्तून्क्षमस्व मे ।।१०१।।**

**।। श्रीमदनन्त उवाच ।।**

**न दैन्यं दुष्कृतं तेऽत्र श्रियं भुक्त्वा पुनर्वसुः । नक्षत्रेषु प्रसादान्मे भविष्यसि महामुने ।।१०२।।**

तदा अग्नि+अरिभ्यः श्रीः हृतः। ततः सः अनन्तं स्मरन् वने अटन् 'अनन्तः क्व?' इति गो+द्रु+गाः पृष्ट्वा कश्मलं आप।९९। तस्मै वृद्ध+विप्र+रूपेण अद्भुतं पुरं नीत्वा स्वं रूपं दर्शयामास। असौ अपि अनन्तं तुष्टाव।१००। '(हे) ईश, भगवन् त्वं वाच्य+वाचक+तया जगत्+मयः ॐकार+वाच्य त्रिगुण+आत्मकः असि। (हे) सर्व+ईश्वर, विश्व+व्यापिन्, जनार्दन, त्वत्+माया+मोहित+धिया कृतान् मे मन्तून् क्षमस्व।'१०१। श्रीमत् अनन्त उवाच। 'ते दैन्यं दुष्कृतं न। (हे) महामुने, अत्र श्रियं भुक्त्वा मे प्रसादात् नक्षत्रेषु पुनर्वसुः भविष्यसि।'१०२।

तेव्हा अनंताच्या कोपाने त्यांची सर्व संपत्ती अग्नी आणि शत्रू यांनी हिरावून घेतली. तेव्हा 'हा अनंताचाच कोप आहे,' असे जाणून तो कौंडिण्य अनंताचे स्मरण करीत, 'अनंत मला कुठे भेटेल?' असे बैल, वृक्ष, गाय यांना विचारीत वनात भटकता भटकता मूर्च्छित झाला.९९. तेव्हा अनंतदेवाला दया येऊन त्यांनी त्याला सावध करून त्याला धीर देऊन एका अद्भुत नगरीत नेले आणि आपले स्वरूप दाखविले. ऋषींनी त्यांचे स्तवन केले.१००. भगवंता, ईश्वरा, वाच्य आणि वाचक तूच असल्याने तू जगताला व्यापून उरला आहेस. तूंच ॐकाराचा अर्थ आहेस आणि त्रिगुणात्मक आहेस. जनार्दना, तुझ्याच मायेने भुलून मी केलेल्या अपराधांची क्षमा कर.१०१. श्रीमत् अनन्तांनी त्याला वर दिला, 'तुला दैन्य आणि पाप लागणार नाहीत. इहजन्मी वैभव भोगून तू माझ्या प्रसादाने नक्षत्रमंडलांत पुनर्वसु होशील.'१०२.

|| ऋषिरुवाच ||

**केऽपि सत्फलिताम्रस्य फलं नाश्नन्ति गोर्मुखे । तृणं नैति पशोश्चापि स्वाद्वप्पूर्णे सरोवरे ।।१०३।।**
**जीवास्पृष्टेऽग्रतो दीनौ खरेभौ च द्विजो जरन् । एते दृष्टा मयैतेषां कुतोऽभूदीदृशी स्थितिः ।।१०४।।**

|| श्रीमदनन्त उवाच ||

**शिष्यान्नापाठयन्मत्तो विद्वांस्तेनाम्र ईदृशः । गौर्जाता मोघभूदानाद् वृषोऽदाताभवद्धनी ।।१०५।।**
**अन्योन्यदानग्रहणादीदृश्यौ स्तः सरस्युभे । खरः क्रोधीभो मदी च द्विजोऽहं तेऽपि मोचिताः ।।१०६।।**

ऋषिः उवाच। 'सत्+फलित+आम्रस्य फलं के अपि न अश्नन्ति। गोः मुखे तृणं न एति पशोःअपि। स्वादु+अप्+पूर्णे सरोवरे जीव+अस्पृष्टे।१०३। अग्रे दीनौ खर+इभौ, जरत् द्विजः च। एते मया दृष्टाः। एषां ईदृशी स्थितिः कुतः अभूत्?'१०४। श्रीमत् अनन्त उवाच। 'मत्तः विद्वान् शिष्यान् न अपठयन् तेन ईदृशः आम्रः। मोघ+भू+दानात् गौः जाता। अदाता धनी वृषः अभवत्।'१०५। उभे अन्यः+अन्य+दान+ग्रहणात् सरसि स्तः। क्रोधी खरः, मदी च इभः। अहं द्विजः। ते अपि मोाचिताः।'१०६।

ऋषींनी अनन्ताला विचारले, 'मी येताना एक आंबा पाहिला. तो उत्तम फळांनी लखडलेला असूनही त्याची फळे कुणीच खात नाहीत. तसेच पुढे एक गाय पाहिली. तिच्या व पशूंच्या तोंडात गवतच येत नाही. पुढे गोड पाण्याने भरलेल्या दोन तळ्या पाहिल्या. त्यांना कुठलेही जीव स्पर्शत नव्हते.१०३. पुढे दीनवाणे दिसणारे एक गाढव व एक हत्ती पाहिले. आणि एक वृद्ध ब्राह्मण पाहिला. त्यांची ही अशी अवस्था का झाली?'१०४. श्रीमत् अनन्तदेव म्हणाले, 'आपल्या विद्वत्तेच्या मदात शिष्यांना न शिकवल्याने तो विद्वान् असा आम्रवृक्ष झाला. नापीक जमिनीचे दान करणारी या गाईच्या जन्माला आली. धनवान् असूनही दान न केल्याने बैल झाला.१०५. दोघींनी आपापसांतच दान दिले-घेतले म्हणून त्या ह्या तळ्या झाल्या. क्रोधी माणसाला गाढवाचा, मदोन्मत्ताला हत्तीचा जन्म मिळाला. तो वृद्ध मीच होतो. या सर्व तू पाहिलेल्या जीवांना मुक्ती दिली.'१०६.

**इति लब्धवरोऽनन्तं नत्वैत्य स तथाभवत् । तस्माद्व्रतोत्तमं धर्म व्रतं चर हितं भवेत् ।।१०७।।**
**इति कृष्णोऽब्रवीत्सोऽपि व्रतं कृत्वा हताहितः । अकण्टकं चिरं राज्यमृद्धं भुक्त्वामृतं ययौ ।।१०८।।**
**त्वमप्याचर विप्रेदमत्रामुत्रापि सौख्यदम् । इत्युक्तः प्रभुणानन्त-व्रतं चक्रे द्विजोत्तमः ।।१०९।।**
**तत्र स्थित्वा स्वकैः सार्धं प्रेत्य सायुज्यमाप्तवान् । तद्वंशजा अपि गुरोः प्रसादात्तादृशोऽभवन् ।।११०।।**

'इति लब्ध+वरः सः अनन्तं नत्वा एत्य तथा अभवत्। तस्मात् (हे) धर्म, व्रतं चर हितं भवेत्।'१०७। इति कृष्णः अब्रवीत्। सः अपि व्रतं कृत्वा हत+अहितः अकण्टकं चिरं ऋद्धं राज्यं भुक्त्वा अमृतं ययौ।१०८। '(हे) विप्र त्वं अपि अत्र अमुत्र अपि सौख्यदं (व्रतं) आचर।' इति प्रभुणा उक्तः द्विजउत्तमः अनन्तव्रतं चक्रे।१०९। स्वकैः सार्धं तत्र स्थित्वा प्रेत्य सायुज्यं आप्तवान्। तत् वंशजाः अपि गुरौः प्रसादात् तादृशाः अभवन्।११०।

'असा वर पावून त्या कौंडिण्याने अनन्ताला नमस्कार केला. घरी परत येऊन त्याप्रमाणेच सिद्धी मिळाली. यासाठी, हे धर्मराजा, तू हे महान् व्रत कर. तुझे कल्याण होईल!'१०७. असा श्रीकृष्णाचा आदेश झाल्याप्रमाणे त्याने अनंतव्रत केले. त्यायोगे त्याने शत्रूचा नाश करून अकंटक आणि समृद्ध राज्य दीर्घकाल उपभोगले आणि अंती मोक्ष पावला.१०८. श्रीगुरू सायंदेवाला सांगतात, 'ब्राह्मणा, तूसुद्धा ह्या इह आणि परत्र सुख देणाऱ्या व्रताचे आचरण कर.' अशी श्रीगुरूंची आज्ञा घेऊन त्या ब्राह्मणवर्याने अनंतव्रत केले.१०९. आपल्या कुटंबासह तिथे गाणगापुरांत राहून मृत्यूनंतर सायुज्य मुक्तीचा धनी झाला. त्याचे वंशजही श्रीगुरूंच्या प्रसादाने त्याच्यासारखेच झाले.११०.

**त्वमपीदृक्तत्प्रसादाद् भक्तिमानसि सद्गुरौ । मा भीस्तरिष्यसि भवं मृगतृष्णोपमं द्रुतम् ।।१११।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।**

**आदितः विंशोऽध्यायः ।।**

त्वं अपि तत्+प्रसादात् ईदृक् सत्+गुरौ भक्तिमान् असि। मा भीः। मृग+तृष्ण+उपमं भवं द्रुतं तरिष्यसि।१११।

नामधारका, तूही त्यांच्याप्रमाणेच सद्गुरूंच्या भक्तीने संपन्न आहेस! भिऊ नकोस! हा मृगजळासारखा संसारसागर तू सहज तरून जाशील.'

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा दुसरा आणि प्रथमपासून विसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथैकविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधूदितं चरित्रं भो प्रभोर्धन्यं दिनं त्विदम् । क्षणमात्रोऽपि कालोऽद्य नातीतस्तत्कथामृते ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**तन्तुको नाम भक्तोऽभूत् त्रियामं भगवत्प्रियः । संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तमाभजत् ।।२।।**
**तद्बन्धुता कदाचित्तं श्रीशैलं गन्तुमाह्वयत् । स प्राह मे मठः शैलः श्रीगुरुर्मल्लिकार्जुनः ।।३।।**

नामधारक उवाच। भोः प्रभोः चरित्रं साधु उदितम्। इदं दिनं तु धन्यम्। अद्य क्षणमात्रः अपि कालः तत् कथां ऋते न अतीतः।१। सिद्ध उवाच। तन्तुकः नाम भगवत्+प्रियः भक्तः अभूत्। त्रियामं संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तं आभजत्।२। कदाचित् तत् बन्धुता तं श्रीशैलं गन्तुं आह्वयत्। स प्राह, 'मठः मे शैलः, श्रीगुरुः मल्लिक+अर्जुनः'। 'कुतः न इतः असि' इति अजेन पृष्टः अपि पूर्ववत् प्राह।३।

नामधारक म्हणाला, 'आपण श्रीगुरुप्रभूंचे चरित्र फार उत्तम सांगितले. आजचा दिवस खरोखर धन्य आहे! क्षणभरसुद्धा आज श्रीगुरूंच्या कथेवाचून गेला नाही.'१. सिद्धमुनींनी सांगायला सुरुवात केली. 'तन्तुक नावाचा श्रीगुरूंना प्रिय असलेला एक शिष्य होता. तो दिवसाचे तीन प्रहर आपले सांसारिक कर्तव्य पार पाडून एक प्रहर (तीन तास) श्रीगुरूंची सेवा करीत असे.'२. एकदा त्याची भावकी श्रीशैल्याच्या यात्रेला निघाली. तेव्हा त्यालाही आपल्याबरोबर येण्याचा त्यांनी आग्रह केला. तो म्हणाला, 'गाणगापूरचा हा मठ हेच माझे श्रीशैल्य आहे; आणि श्रीगुरू हेच माझे मल्लिकार्जुन आहेत.'३.

**सा तं निषिध्य मूर्खोऽयमिति मत्वा ययौ नगम् । कुतो नेतोऽसीत्यजेन पृष्टोऽपि प्राह पूर्ववत् ।।४।।**
**ततो माघेऽल्पकालेन शिवरात्रिरुपस्थिता । मध्याह्ने तद्दिनेऽजस्तं प्राह शैलोत्सवोऽद्य सन् ।।५।।**

**।। तन्तुक उवाच ।।**

**त्वत्पादाब्जोत्सवान्मन्ये क्वापि नास्त्यधिकोत्सवः । इदं प्रत्यक्षमज्ञाय मुधा मुग्धा भ्रमन्ति कौ ।।६।।**
**तच्छ्रुत्वा प्राह भगवान्मा ब्रूहीदं जगत्प्रभुः । सर्वत्रावस्थितोऽप्येष सत्क्षेत्रमहिमा वरः ।।७।।**
**महातपस्विभिः क्षेत्रं पवित्रीकृतमस्ति तत् । परमात्मा तत्प्रभावात् तत्र जागर्त्यनारतम् ।।८।।**

सा तं निषिध्य, 'अयं मूर्खः' इति मत्वा नगं ययौ।४। ततः अल्प+कालेन माघे शिवरात्रिः उपस्थिता। तत् दिने मध्य+अह्ने अजः तं प्राह। अद्य शैल+उत्सवः सन्।५। तन्तुक उवाच। त्वत्+पाद+अब्ज+उत्सवात् अधिकः क्व अपि उत्सवः न अस्ति। इदं प्रत्यक्षं अज्ञाय मुग्धा मुधा कौ भ्रमन्ति।६। तत् श्रुत्वा भगवान् प्राह। इदं मा ब्रूहि। जगत्+प्रभुः सर्वत्र अवस्थितः अपि एष सत्+क्षेत्रमहिमा वरः।७। क्षेत्रं महा+तपस्विभिः पवित्री+कृतं अस्ति। तत् तत्+प्रभावात् परमात्मा तत्र अनारतं जागर्ति।८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'आपल्या बांधवांसह श्रीशैल्याला का गेला नाहीस?' तेव्हाही त्याने पूर्वीप्रमाणेच उत्तर दिले.४. पुढे थोड्याच काळाने माघ महिन्यात शिवरात्र आली. त्या दिवशी माध्याह्नी श्रीगुरू म्हणाले, 'आज श्रीशैल्याचा मोठा उत्सव आहे.'

तन्तुक उत्तरला, 'आपल्या चरणकमलांपेक्षा मोठा उत्सव कुठेच नाही. हे प्रत्यक्ष सोडून अज्ञानी लोक उगीच पृथ्वीवर भटकत असतात.'६. त्याचे बोलणे ऐकून श्रीगुरुभगवान म्हणाले, 'असे बोलू नकोस. जगाचा स्वामी सर्वत्रच आहे हे खरे आहे. पण पुण्यक्षेत्रांचा महिमा थोर आहे.७. क्षेत्र महान् तपस्व्यांनी आपल्या वास्तव्याने पवित्र केलेले असते. म्हणून त्यांच्या प्रभावाने तिथे परमेश्वर निरंतर जागत असतो.८.

**अतस्तत्रैव भजतां कार्यसिद्धिर्भवत्यरम् । महातपस्विनो धन्याः स्वयं मुक्ता अपीतरान् ।।९।।**
**मोचयन्ति स्वतपसा जन्मसंसारबन्धनात् । लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः ।।१०।।**
**तत्संचारस्थलरजः-संस्पर्शोऽप्यत्र मुक्तये । अतस्तत्सेवितक्षेत्रे लोको यास्यति सादरम् ।।११।।**
**एह्यद्य योगगत्याद्रिं गत्वा ते दर्शयामि तत् । इत्युक्त्वा पादुके दिव्ये धारयित्वा दृढं दृशौ ।।१२।।**
**निमीलयित्वा श्रीशैलं सह तेन ययौ क्षणात् । प्राहोन्मील्य दृशौ पश्य श्रीशैलममुमित्यजः ।।१३।।**

अतः तत्र एव भजतां अरं कार्य+सिद्धिः भवति। महा+तपस्विनः धन्याः। स्वयं मुक्ताः अपि इतरान्..।९। स्व+तपसा जन्म+संसार+बन्धनात् मोचयन्ति। सत्+तपस्वि+विभूतयः लोक+उद्धृत्यै प्रजायन्ति।१०। 'तत् संचार+स्थल+रज+स्पर्शः अपि अत्र मुक्तये। अतः तत्+सेवित+क्षेत्रे लोकाः सादरं याति'।११। 'एहि, अद्य योग+गत्या अद्रिं गत्वा तत् ते दर्शयामि,' इति उक्त्वा दिव्ये पादुका धारयित्वा, दृशौ दृढं..।१२। निमीलयित्वा तेन सह क्षणात् श्रीशैलं ययौ। 'अमुं श्रीशैलं, दृशौ उन्मील्य पश्य,' इति अजः प्राह।१३।

त्यामुळे तिथे पूजा-पाठ-जप आदि उपासना करणाऱ्यांची कार्यसिद्धी लवकर होते. महातपस्वी हे स्वतः तर मुक्त असतातच पण इतरांनाही..(९) आपल्या तपाच्या सामर्थ्याने मुक्त करतात. लोकांच्या उद्धारासाठीच ह्या थोर तपस्वी विभूती जन्माला येतात.१०. (*जगाच्या कल्याणा संताच्या विभूती।* संत तुकाराम)' 'त्यांच्या संचाराने पावन झालेल्या भूमीची धूळ जरी लागली तर माणूस मुक्त होतो. म्हणून त्यांच्या वासाने पवित्र झालेल्या क्षेत्रांना लोक आदरपूर्वक जातात.(११) चल, आज योगगतीने मी तुला नेऊन श्रीशैल्याचे दर्शन घडवितो.' असे म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपल्या दिव्य पादुका धरून डोळे घट्ट मिटायला सांगितले. क्षणार्धात श्रीशैल्याला येऊन म्हणाले, 'डोळे उघडून पाहा हा श्रीशैल्य पर्वत!'१३.

**सोऽप्युन्मीलितदृग्दृष्ट्वा श्रीगिरिं तदनुज्ञया । क्षौरस्नानादि कृत्वागाद् द्रष्टुं श्रीमल्लिकार्जुनम् ।।१४।।**
**यान्तं स्वकः प्रेक्ष्य तमाह नोऽनु-यातोऽसि कस्मान्न युतिं करोषि ।**
**अद्य क्षणाच्छ्रीगुरुणाऽऽहृतोऽस्मी-त्युक्तोऽपि तेनोक्तममंस्त मिथ्या ।।१५।।**
**तस्मै यथास्वं स निवेद्य भक्तो । गुर्वङ्घ्रिपद्मद्वय एकतानः ।**
**प्रासादमेत्यान्तरनेकलोक-व्याप्तं विवेशेश्वरदर्शनाय ।।१६।।**
**तत्रोपविष्टं गुरुमर्चयन्ति । सर्वेऽपि कश्चिन्न हि तत्र देवः ।**
**इत्थं विलोक्यापि गुरुं प्रपूज्य । पुनर्गुरुं प्राप्य तदुक्तवान्सः ।।१७।।**

सः अपि उन्मीलित+दृक् श्रीगिरिं दृष्ट्वा तत् अनुज्ञया क्षौर+स्नान+आदि कृत्वा श्रीमल्लिकार्जुनं द्रष्टुं अगात्।१४। स्वकः यान्तं प्रेक्ष्य तं आह, 'नः अनुयातः असि! कस्मात् युतिं न करोषि?' तेन उक्तम् 'अद्य क्षणात् गुरुणा आहृतः अस्मि', मिथ्या ममंस्त।१५। सः भक्तः तस्मै यथास्वं निवेद्य गुरु+अङ्घ्रि+पद्म+द्वय एकतानः अनेक+लोक+व्याप्तं प्रासादं एत्य ईश्वर+दर्शनाय अन्तः विवेश।१६। तत्र सर्वे अपि उपविष्टं गुरुं अर्चयन्ति। तत्र कश्चित् देवः न हि। इत्थं विलोक्य अपि गुरुं प्रपूज्य पुनः गुरुं प्राप्य सः तत् उक्तवान्।१७।

तंतुकाने डोळे उघडून श्रीगिरीचे दर्शन घेतले. मग त्याने श्रीगुरूंच्या आज्ञेने क्षौर, स्नान इत्यादि करून तो श्रीमल्लिकार्जुनाच्या दर्शनासाठी निघाला.१४. त्याला देवळात जाताना त्याच्या आप्ताने पाहिले. तो म्हणाला, 'आमच्या मागे मागे आलास तर मग वाटेत आम्हाला का भेटला नाहीस?' त्याने आपल्याला श्रीगुरूंनी आत्ता एका क्षणापूर्वी आणल्याचे सांगितले. त्याचा त्याच्यावर विश्वास न बसल्याने तो खोटे सांगतो असेच त्याला वाटले.१५. त्या आप्ताचे यथायोग्य समाधान करून तो श्रीगुरुचरणांच्या पायांच्या चिंतनात एकाग्रचित्त होऊन, दर्शनोत्सुक लोकांनी गजबजलेल्या त्या मंदिरांत आला आणि ईश्वरदर्शनासाठी त्याने अंतर्गृहात प्रवेश केला.१६. त्याने पाहिले तर तिथे कोणताच देव नसून श्रीगुरूच बसलेले आहेत. सर्व लोक त्यांचीच पूजा करीत आहेत. त्यानेही श्रीगुरूंची पूजा केली आणि पुन्हा श्रीगुरूंपाशी येऊन म्हणाला.१७.

**अत्र त्वमेवासि कुतोऽज्ञलोका । आयान्ति हित्वा निकटस्थितं त्वाम् ।**
**व्याप्याखिलं त्वं परिपूर्णविश्वं । दशाङ्गुलं तिष्ठसि वक्ति वेदः ॥१८॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**एकः परात्मा भजतां तथापि । स्थानप्रभावः प्रिय भिन्न एव ।**
**स्थानं त्विदं सर्वजनाश्रयं सन् । मुक्तिप्रदं शृण्विह पूर्ववृत्तम् ॥१९॥**
**विमर्षणो नाम नृपः किरात-देशे कृती क्षात्रवृषप्रवीणः ।**
**द्विजातिभक्तोऽपि च भूतमात्र-हिते रतः साधुजनानुयायी ॥२०॥**

'त्वं एव अत्र असि! अज्ञ लोकाः निकट+स्थितं त्वां हित्वा कुतः आयान्ति? (हे) परिपूर्ण, वेदः वक्ति, त्वं अखिलं विश्वं व्याप्य दश+अङ्गुलं तिष्ठसि।'१८। श्रीगुरुः उवाच। (हे) प्रिय, पर+आत्मा एकः। तथापि भजतां स्थान+प्रभावः भिन्न एव। इदं तु सर्व+जन+आश्रयं मुक्ति+प्रदं सन् स्थानम्। इह पूर्ववृत्तं शृणु।१९। किरात+देशे विमर्षणः नाम क्षात्र+वृष+प्रवीणः कृती नृपः द्विजाति+भक्तः अपि च भूत+मात्र+हिते रतः साधु+जन+अनुयायी।२०।

'इथे मंदिरातही आपणच आहात! हे वेडे लोक निकटच असलेल्या तुम्हाला सोडून इतक्या दूर का बरे येतात? परिपूर्ण सद्गुरो, वेदांत सांगितल्याप्रमाणे आपण सर्व विश्व व्यापून दहा अंगुळे उरलेला आहात.' अधिष्ठानत्वाने विवर्ताहून अधिक आहात असा भावार्थ.१८. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'प्रिय भक्ता, परमात्मा एकच आहे. तरीही उपासकांसाठी त्या त्या स्थानांचा प्रभावही वेगवेगळा असतो. हे श्रीशैल्य सर्व लोकांना आश्रयभूत आणि मुक्तिप्रद स्थान आहे. तुला एक प्राचीन कथा सांगतो, ऐक.' १९. किरात देशी एक विमर्षण नावाचा राजा होता. तो क्षात्रधर्मात कुशल, कर्तृत्ववान्, सर्व जीवांचे हित जपणारा, देवद्विजांचा भक्त आणि साधूंचे अनुसरण करणारा होता.२०.

**स्त्रीलम्पटः प्राग्गुणतो निषिद्धभुक् । शैवोत्तमः शङ्कररूपचिन्तकः ।**
**तं प्राह साध्वी महिषी कथं शिवे । भक्तिर्दृढा धर्मविरुद्धचेष्ट ते ।।२१।।**

**।। राजोवाच ।।**

**पम्पापुरे श्वाभवमाद्यजन्यामुच्छिष्टमत्तुं शिवसद्म यातम् ।**
**हन्युर्जना द्वारि मृतिक्षणेऽजो । दृष्टोऽर्चितः प्रोज्वलिताश्च दीपाः ।।२२।।**
**प्रदक्षिणं तं हि परीत्य शैवे । दिने मृतस्तेन नृपोऽत्र शैवः ।**
**ये दुर्गुणास्ते श्वनिसर्गजोत्थाः । स्युः पूर्वसंस्कृत्यनुगो हि जीवः ।।२३।।**

शैव+उत्तमः शङ्कर+रूप+चिन्तकः (अपि) प्राक्+गुणतः स्त्री+लम्पटः निषिद्ध+भुक् (आस)। साध्वी महिषी तं प्राह, '(हे) धर्म+विरुद्ध+चेष्ट, ते शिवे दृढा भक्तिः कथम्?'२१। राजा उवाच। आद्य+जन्यां पम्पापुरे श्वा अभवम्। उच्छिष्टं अत्तुं शिव+सद्म यातं जनाः द्वारि हन्युः। मृति+क्षणे अर्चितः अजः, तं प्रदक्षिणं परीत्य हि, दृष्टः, प्रोज्वलिताः दीपाः च।२२। शैवे दिने मृतः तेन अत्र शैवः नृपः। ये दुर्गुणाः श्व+निसर्ग+ज+उत्थाः। जीवः पूर्व+संस्कृति+अनुगः स्युः।२३।

तो भगवान् शंकरांच्या रूपाचे सतत चिन्तन करणारा परम शिवभक्त असूनही पूर्वसंस्कारांमुळे स्त्रैण वृत्तीचा होता. तसेच त्याला अभक्ष्य भक्षणाचीही आवड होती. एकदा त्याच्या साध्वी पत्नीने - अभिषिक्त राणीने, त्याला विचारले, 'अहो, तुमचे आचरण असे धर्माविरुद्ध असूनही तुमची शंकरांच्या ठायी एवढी दृढ भक्ती कशी आहे?'२१. राजा उत्तरला, 'पूर्वजन्मी पंपापुरीत कुत्रा होतो. एकदा उष्टे-खरकटे कांही खायला मिळाले तर पाहावे म्हणून मी शंकराच्या देवळात जात असताना लोकांनी मला दारात मारून टाकले. मरताना माझी देवाला प्रदक्षिणा झाली, पूजा केलेल्या देवाचे दर्शन झाले आणि दारासमोर उजळलेले दीप दिसले.२२. तो दिवस सोमवार होता. त्या पुण्याईने मी हा शिवभक्त राजाचा जन्म पावलो आहे. माझे जे दुर्गुण आहेत श्वानस्वभावांतून आले आहेत.' भगवद्गीतेच्या वचनानुसार भौतिक शरीर आणि इंद्रिये यांच्या कर्तृत्वाला स्वभावच कारण असतो (*कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।।* १३:२०). विद्वान् किंवा

**प्राङ्मे जनिः क्वेति तयाह पृष्टः । प्राक्त्वां कपोतीं सति चञ्चुमांसाम् ।**
**चिल्लोऽहनच्छ्रीमदगे शिवाग्रे । प्राणार्पणान्मे महिषीह जाता ।।२४।।**
**क्वेतो भवान् यास्यसि चाप्यहं क्व । शंसेति पृष्टः स तु सिन्धुदेशे ।**
**राजा भविष्याम्यपि सृञ्जयोत्था । मत्स्त्री त्वमग्रेऽपि कलिङ्गजा त्वम् ।।२५।।**
**सौराष्ट्रकेऽहं खलु मागधी त्वं । गान्धारजावन्तिदशार्णजौ च ।**
**नृपोऽप्यनन्तोऽपि ययातिजा त्वं । पाण्ड्योऽहमग्रेऽपि विदर्भजा त्वम् ।।२६।।**

तया 'प्राक् मे जनिः क्व?' इति पृष्टः आह। '(हे) सति, प्राक् त्वां चञ्चु+मांसां कपोतीं चिल्लः श्रीमत्+अगे अहनत्। शिव+अग्रे प्राण+अर्पणात् इह मे महिषी जाता।'२४। 'इतः भवान् क्व यास्यसि? अहं च अपि क्व? शंस' इति पृष्टः सःतु, 'सिन्धुदेशे राजा भविष्यामि। त्वं सृंजय+उत्था मत्+स्त्रीः। अग्रे अपि त्वं कलिङ्ग+जा,'।२५। 'अहं सौराष्ट्रके। त्वं मागधी (अहं) गांधारजः। अवन्तिदशार्णजौ च। अनन्तः नृपः त्वं ययाति+जा। अग्रे अहं पाण्ड्यः त्वं अपि विदर्भजा।२६।

भक्तही असला तरी तो आपल्या स्वभावानुसारच रहाटतो (*सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।* भ.गीता ३:३३)२३. तेव्हा राणीने आणखी विचारले, 'माझा पूर्वजन्म कुठे झाला?' राजाने सांगितले, 'तू मागच्या जन्मात कपोती होतीस.तू एकदा चोचीत मांसाचा घास घेऊन उडत असता श्रीशैल्यावर एका घारीने तुला त्या मांसासाठी मारून टाकले. शंकरासमोर प्राण अर्पण केल्याने तू इथे माझी पट्टराणी झालीस.'२४. 'आता यापुढच्या जन्मात तुमची माझी गती काय असेल? मला सांगा,' असे राणीने विचारल्यावर राजा सांगू लागला. 'मी पुढील जन्मात सिंधुदेशाचा राजा होणार आहे आणि तुझा जन्म सृंजय देशाच्या राजाच्या पोटी होईल आणि पुन्हा तुझे माझ्याशीच लग्न होईल. त्यापुढच्या जन्मांत तू कलिंग देशाची राजकुमारी होशील.'२५. 'आणि मी सौराष्ट्रांत राजा होईन. चौथ्या जन्मात तू मगध देशाची राजकुमारी होशील गांधार देशात जन्मलेल्या माझ्याशी विवाह करशील. पाचव्या जन्मात अवन्ती आणि दशार्ण देशात जन्म घेऊन आपण लग्न करू. सहाव्या जन्मात मी अनन्तः नावाचा राजा होईन आणि तू ययातीची कन्या होऊन माझी पट्टराणी होशील. सातव्या जन्मात मी पांड्य देशाचा राजा आणि तू विदर्भाची राजकुमारी होशील.२६.

**स्मरोपमो धीगुणशीलशाल्यहं । वृत्वा तदा त्वां रतिभां स्वयंवरे ।**
**त्वया सहेष्ट्वा पुरुदक्षिणान्मखान् । सम्राट्तया प्राप्य सुतान्सुभोगयुक् ।।२७।।**
**लब्ध्वात्मतत्त्वं घटजाच्च जीवन्-मुक्तो भविष्यामि सह त्वयैवम् ।**
**राड्दम्पती वै प्रतिजन्म भूत्वा । मुक्तौ भविष्याव इति ह्यवोचत् ।।२८।।**
**शम्भोः पुरः साहजिकासुदानादेवं तिरश्चोऽपि गतिस्तु लोकाः ।**
**बुद्ध्वेदमायान्त्यपि देवता तु । स्थलानुमानात् खलु जागरूका ।।२९।।**
**इत्युक्त्वा धारयित्वेशः पादुके सङ्गमं क्षणात् । तमानीयेरयद् ग्रामं प्रहृष्टः प्रययौ स तु ।।३०।।**

स्मर+उपमः धी+गुण+शील+शाली अहं रति+भां त्वां स्वयंवरे वृत्वा, त्वया सह पुरु+दक्षिणान् मखान् इष्ट्वा सम्राट्तया सुतान् प्राप्य सुभोग+युक्।२७। घटजात् आत्मतत्त्वं लब्ध्वा जीवन्मुक्तः भविष्यामि। एवं त्वया सह प्रतिजन्म वै राट्+दम्पती भूत्वा मुक्तौ भविष्याव।' इति हि अवोचत्।२८। 'शम्भोः पुरः साहजिक असु+दानात् तिरश्च अपि एवं गतिः। लोकाः तु इदं बुद्ध्वा आयान्ति। देवता तु स्थल+अनुमानात् जागरूका खलु'।२९। इति उक्त्वा ईशः तं पादुके धारयित्वा क्षणात् सङ्गमं आनीयेरयत्। सः तु प्रहृष्टः ग्रामं ययौ।३०।

मी मदनासारखा सुंदर, बुद्धिमान, गुणवान् सुशील असेन आणि रतीसम रूपवान अशा तुझ्याशी स्वयंवरात लग्न करीन. तुझ्यासह मी सम्राट होऊन अनेक मोठमोठे यज्ञ करीन. अमरकोशानुसार (२:७:३), 'जो राजसूय यज्ञ करतो, राजमंडलाचा अधिपती असतो आणि ज्याच्या आज्ञेने राजे लोक शासन करतात तो सम्राट.' आपण सर्व ऐहिक सुखांचा भोग घेऊ. आपल्याला अनेक पुत्र होतील.२७ उतारवयात मी अगस्ती महर्षींकडून आत्मज्ञान प्राप्त करीन जीवन्मुक्त होईन. अशा रीतीने तुझ्यासह प्रत्येक जन्मात राजाराणी होऊन आपण मुक्त होऊ.'२९. तंतुकाला श्रीगुरू सांगतात, 'शिवमंदिरासमोर नैसर्गिक प्राणदानानेसुद्धा पशु-पक्ष्यांना अशी गती लाभते. (मग संकल्पपुरःसर जपतपादि करणाऱ्या मनुष्यांचे फळ किती असेल?) हे जाणून लोक श्रीशैल्याला येतात. तात्पर्य देवता स्थानाच्या प्रभावानुसार जागरूक असतात.'२९. इतके बोलून श्रीगुरूंनी तंतुकाला पुन्हा पादुका धरायला लावून क्षणभरात संगमावर आणले. तो हर्षोत्फुल्ल चित्ताने गाणगापूराला गेला.३०.

**तत्रत्याः सङ्गमेऽदृष्ट्वा गुरुं खिन्ना अवेक्ष्य तम् । आयान्तमब्रुवन्यान्तः कस्मात् क्षौरं कृतं त्वया ॥३१॥**
**स प्राह मां क्षणान्नीत्वा श्रीशैलं भो यथाविधि । क्षेत्राचारं कारयित्वा सम्प्रत्यत्रानयत्प्रभुः ॥३२॥**
**तच्छ्रुत्वात्रैष मध्याह्ने दृष्टो ब्रूते मृषेति ते । मत्वैत्य सङ्गमे तत्र निशि सर्व उपोषिताः ॥३३॥**
**चक्रुर्जागरणं शैव-नामोच्चारणपूर्वकम् । ततः शैलाज्जनः प्राप्तः पक्षात्स प्राह विस्मितः ॥३४॥**
**श्रीशैलेऽयं शिवद्वारि तन्तुकः सकृदीक्षितः । तदा सप्रत्ययाः सर्वे ननन्दुर्विस्मिता भृशम् ॥३५॥**

तत्रत्याः गुरुं सङ्गमे अदृष्ट्वा खिन्ना यान्तः तं आयान्तं अवेक्ष्य अब्रुवन् 'त्वया कस्मात् क्षौरं कृतम्?'।३१। सः प्राह, 'भो, प्रभुः मां क्षणात् श्रीशैलं नीत्वा, यथाविधि क्षेत्र+आचारं कारयित्वा सम्प्रति अत्र आनयत्'।३२। तत् श्रुत्वा ते 'एष मध्य+अह्ने दृष्टः, मृषा ब्रूते' इति मत्वा सङ्गमे एत्य तत्र निशि सर्व उपोषिताः।३३। शैव+नाम+उच्चारण+पूर्वकं जागरणं चक्रुः। ततः पक्षात् शैलात् जनः प्राप्तः। सः विस्मितः प्राह।३४। 'अयं तन्तुकः श्रीशैले शिव+द्वारि सकृत् ईक्षितः। तदा सर्वे स+प्रत्ययाः भृशं विस्मिताः ननन्दुः।३५।'

तंतुक त्वरेने गावाकडे जात असता, श्रीगुरू संगमावर नसल्याने खिन्न होऊन गावाकडे परतणारे तेथील लोक त्याला भेटले. त्यांनी त्याला येताना पाहून विचारले, 'अरे, तू हे क्षौर कशासाठी केलेस?'३१. तो म्हणाला, 'अहो, श्रीगुरुमहाराजांनी मला आज क्षणार्धात श्रैशैल्याला नेले. माझ्याकडून यथाविधी सर्व क्षेत्राचार करविला; आणि आत्ताच थोड्या वेळापूर्वी मला परत आणले!'३२. ते ऐकून त्या लोकांनी विचार केला की 'आत्तां दुपारीच तर याला इथे पाहिला. थापा मारतोय.' मग ते सर्व संगमावर आले. शिवरात्रीचा उपास करून रात्री(३३) शिवनामाच्या भजनाच्या गजरांत जागरण केले. पंधरा दिवसांनी तंतुकाचे भाऊबंद श्रीशैल्याहून परतले. त्यांनी सांगितले, 'हा तंतुक श्रीशैल्याला मंदिरासमोर एकदा पाहिला होता खरा!' तेव्हा सर्वांना श्रीगुरूंच्या सामर्थ्याचा प्रत्यय येऊन नवल वाटले आणि आनंदही झाला.३५.

**सद्गुरोः सेवया बाढं कर्मबन्धं निहत्य सः । सिषेवे परमानन्दं यत्र नो द्वन्द्वसाध्वसम् ॥३६॥**
**एकैकयापि भक्त्यैवं मुक्ताः कति न वेद तान् । कवी शिष्यावभूतां तौ मुक्तौ श्रीगुरुकीर्तनात् ॥३७॥**
**गुरुलीलामयास्ताभ्यां प्रभूता ग्रथिताः कथाः । तल्लीला वक्ति कः कात्स्न्यार्द्यत्र वेदोऽपि शङ्कितः ॥३८॥**

**॥ नामधारक उवाच ॥**

**कौ शिष्यौ सद्गुरोर्जातौ तन्मे कथय सादरम् । वक्ता हि श्रोतृपृच्छाशीः स्मृतिमेति यतः कथा ॥३९॥**

**॥ सिद्ध उवाच ॥**

**नन्दिशर्मा द्विजः कश्चित् कुष्ठार्तः तुलजापुरि । त्र्यब्दं तेपे तपः स्वप्ने देव्योक्तं गच्छ चेश्वरीम् ॥४०॥**

सद्गुरोः सेवया कर्म+बन्धं बाढं निहत्य परम+आनन्दं सिषेवे यत्र द्वन्द्व+साध्वसं नो।३६। एवं एक+एकया अपि भक्त्या कति मुक्ताः तान् न वेद। कवी शिष्यौ अभूतां तौ श्रीगुरु+कीर्तनात् मुक्तौ।३७। ताभ्यां ग्रथितां गुरु+लीला+मयाः कथाः प्रभूताः। यत्र वेदः अपि शङ्कितः तत् लीलाः कः कात्स्न्यार्त् वक्ति?३८। नामधारक उवाच। 'सद्गुरोः कौ शिष्यौ जातौ तत् सादरं मे कथय। वक्ता हि श्रोतृ+पृच्छ+आशीः यतः कथा स्मृतिं एति।'३९। सिद्ध उवाच। 'कश्चित् नन्दिशर्मा कुष्ठ+आर्तः द्विजः तुलजा+पुरि त्रि+अब्दं तपं तेपे। देव्या स्वप्ने उक्तं च 'ईश्वरीं गच्छ'।४०।

त्या तंतुकाने पुढे सद्गुरूंची सेवा करून आपले कर्मबंधन पूर्णपणे तोडून टाकले. द्वैताचे भय मागे टाकून निरतिशय परमानंदात निमग्न झाला.३६. अशा रीतीने नऊ भक्तींपैकी एका एका भक्तीनेही किती मुक्त झाले याची गणती नाही. दोन कवी श्रीगुरूंचे शिष्य झाले. श्रीगुरूंच्या लीला गाऊन कीर्तनभक्तीने ते मुक्त झाले.३७. अर्थात् ज्याचे गुण गाता गाता वेदही अचंबित झाले त्याच्या लीला पूर्णतया कोण सांगू शकेल?३८. नामधारक म्हणाला, 'महाराज, श्रीगुरूंच्या लीला गाणारे ते कोण शिष्यद्वय झाले ते ऐकण्यास मी सादर आहे. आपणच (३ऱ्या अध्यायांत) म्हणाल्याप्रमाणे वक्त्यालासुद्धा कथा आठवण्यासाठी प्रश्नाची अपेक्षा असते.'३९. सिद्धांनी सांगायला सुरुवात केली, 'एका नन्दी नावाच्या ब्राह्मणाला कुष्ठ झाले. त्याच्या परिहारासाठी त्याने तुळजापूरला देवीपुढे तीन वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा त्याला देवीने स्वप्नांत चंदला परमेश्वरीकडे जायला सांगितले.'४०.

**स चन्दलेश्वरीं प्राप्य सप्तमासं तपोऽतपत् । तयाप्युक्तं यतिं गच्छ स्थितं भीमामरायुतौ ।।४१।।**
**स प्राह तां गच्छ मर्त्यमिति वक्तुं न लज्जसे । परीक्षितं त ऐश्वर्यमियत्कष्टं कुतोऽर्पितम् ।।४२।।**
**इत्युक्त्वा स तपस्तेपे भक्तैर्देव्या स हापितः । यद्भव्यं तद्भवत्वेव कष्टमेतावदर्जितम् ।।४३।।**
**देव्याज्ञया तथैवाल्पं सह भोग्यमिति द्विजः । मत्वा स्वगतमानम्य देवीं भुक्तो ययौ यतिम् ।।४४।।**
**गन्धर्वपुरमासाद्य स यतिः क्वेत्यपृच्छत । पापं मत्वार्जुनाभं तं कुष्ठिनं नोत्तरं ददुः ।।४५।।**

सः चन्दल+ईश्वरीं प्राप्य सप्त+मासं तपः अतपत्। तया अपि उक्तं, 'भीमा+अमरा+युतौ स्थितं यतिं गच्छ।'४१। सः तां प्राह। 'मर्त्यं गच्छ इति वक्तुं न लज्जसे (किम्)? ते ऐश्वर्यं परीक्षितम्। इयत् कष्टं कुतः अर्पितम्?'४२। इति उक्त्वा सः तपः तेपे। देव्या भक्तैः सः हापितः। 'यत् भव्यं तत् भवतु एव। एतावत् कष्टं अर्जितम्।४३। देव्या आज्ञया तथा एव अल्पं सह भोग्यम्' इति स्वगतं मत्वा द्विजः देवीं आनम्य भुक्तः यतिं ययौ।४४। गन्धर्वपुरं आसाद्य सः 'यतिः क्व?' इति अपृच्छत। तं अर्जुन+आभं कुष्ठिनं पापं मत्वा उत्तरं न ददुः।४५।

देवीच्या आज्ञेप्रमाणे नन्दीने चंदला परमेश्वरीला जाऊन सात महिने तप केले. ईश्वरीनेही त्याला सांगितले की, 'भीमाअमरजा संगमावर संन्यासी आहेत. त्यांच्याकडे जा.'४१. त्यावर नन्दीने देवीला विचारले, 'मर्त्य मानवाकडे मला पाठवायला तुला लाज वाटत नाही का? बघितलं तुझं देवपण! हेच सांगायचे होते तर इतके कष्ट का दिलेस?'४२. असे बोलून त्याने पुन्हा देवीपुढे तप सुरू केले. तेव्हा देवीच्या भोप्यांनी त्याला देवीच्या आदेशाने देवळाबाहेर हाकलून दिले. मग त्याने विचार केला की 'जे व्हायचे होऊ दे. इतके कष्ट केलेत तर देवीच्या आज्ञेप्रमाणे आणखी एक वेळ प्रयत्न करून पाहू.' देवीला नैवेद्य करून पारणा केली आणि गाणगापुरास गेला.४४. तिथे जाऊन त्याने चौकशी केली की 'इथे संन्यासी कुठे आहेत?' पण त्याचे कुष्ठामुळे सर्वांग अर्जुन वृक्षासारखे पांढरे झालेले पाहून अशुभशंकेने कुणी त्याच्याशी बोलेना.४५.

**तं कश्चिदाह स्नात्वारं शिवरात्रिव्रतस्य च । पारणायै मठे देव आयास्यत्यत्र तिष्ठ भोः ।।४६।।**
**अत्रान्तरे प्रभुः प्राप मठं भक्तास्तमब्रुवन् । द्विजोऽर्जुनश्वेतदेह इदानीं कश्चिदागतः ।।४७।।**
**विश्वसाक्षी तमाहूय प्राह हित्वामरान्नरम् । आयातोऽसि कुतोऽर्हः किं दोषोत्थस्थास्नुरुग्हृतौ ।।४८।।**
**तच्छ्रुत्वा मत्कृतं ज्ञातमनेनैष न मानुषः । प्रत्यक्षः परमात्मेति मत्वोचे तं क्षमाप्य सः ।।४९।।**
**मूढोऽहं कुत्सितमतिः पापात्मा पापसम्भवः । शरण्यं त्वां प्रपन्नोऽस्मि दयाब्धिं भक्तवत्सलम् ।।५०।।**

कश्चित् तं आह, 'देव स्नात्वा शिवरात्रि+व्रतस्य पारणायै मठे आयास्यति। भोः अत्र तिष्ठ'।४६। अत्र+अन्तरे प्रभुः मठं प्राप। भक्ताः तं अब्रुवन्। 'इदानीं कश्चित् अर्जुन+श्वेत+देह द्विजः आगतः।'४७। विश्व+साक्षी तं आहूय प्राह, 'अमरान् हित्वा नरं कुतः आयातः असि? दोष+उत्थ+स्थास्नु+रुक्+हृतौ (नरः) अर्हः किम्?'४८। तत् श्रुत्वा, 'अनेन मत्+कृतं ज्ञातम्। एष न मानुषः, प्रत्यक्षः परमात्मा।' इति मत्वा सः तं क्षमाप्य।४९। 'अहं मूढः कुत्सित+मतिः पाप+आत्मा पाप+संभवः त्वां शरण्यं दया+अब्धिं भक्त+वत्सलं प्रपन्नः अस्मि।'५०।

कुणी तरी त्याला म्हणाले, 'गुरुदेव स्नानादि उरकून शिवरात्रीच्या पारण्यासाठी मठात येतील. तुम्ही इथेच थांबा.'४६. एवढ्यात प्रभू मठाला आलेच. भक्तांनी त्यांना सांगितले, 'आत्ता इथे एक अर्जुनाच्या झाडाप्रमाणे पांढरा शुभ्र ब्राह्मण आलेला आहे.' विश्वसाक्षी श्रीगुरूंनी त्याला बोलावून विचारले. 'देवाला सोडून माणसाकडे कसे आलात? दीर्घकाल स्थिरावलेल्या रोगाचा परिहार मर्त्य मानव करण्याला समर्थ असेल का?'४८. ते ऐकून नंदी चमकला. 'यांनी माझा इतिहास आणि माझे मन ओळखले. हे सामान्य मानव नाही. हे तर साक्षात् परमात्मा आहेत!' असा विचार करून त्याने त्यांची क्षमा मागितली.४९. तो म्हणाला, 'मी मूर्ख आहे, कुबुद्धी आहे, पापी आहे आणि पापापासूनच उपजलेला आहे. दयासागरा, भक्तवत्सला, आपणच योग्य आश्रय आहात असे जाणून मी आपल्याला शरण आलो आहे.'५०.

**मयि कुष्ठं समुत्पन्नं विवाहोर्ध्वं तदैव तु । पितृदारैरपि परि-त्यक्तं मां कोऽपि नेक्षते ।।५१।।**
**नाङ्गीकुर्वन्त्यपि सुरा भात्यतोऽपि मृतिर्वरम् । परात्मना त्वया नोचेत्स्वीकृतोऽत्र जहाम्यसून् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीः पापोत्थरोगोऽयमियत्कालमनेन तु । भुक्तं पापमतो भक्तिर्मयि जाताचलामला ।।५३।।**
**अत्रास्ते सङ्गमे तीर्थ-राजोऽघौघविनाशनः । तत्र स्नाहीति संभाष्य सोमनाथमथाब्रवीत् ।।५४।।**
**विधिवत्कारयित्वा षट्-कूलतीर्थे सचैलकम् । अश्वत्थमर्चयित्वा द्राक् सोमनाथामुमानय ।।५५।।**

'विवाह+ऊर्ध्वं मयि कुष्ठं समुत्पन्नम्। तदा एव तु पितृ+दारैः अपि मां परित्यक्तम्। मां कः अपि न ईक्षते।'५१। 'सुराः अपि न अङ्गीकुर्वन्ति। अतः मृतिः अपि वरं भाति। त्वया पर+आत्मना नो स्वीकृतः चेत् अत्र असून् जहामि'।५२। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अयं पाप+उत्थ+रोगः। इयत् कालं अनेन पापं भुक्तम्। अतः मयि अचला अमला भक्तिः जाता।५३। अत्र सङ्गमे अघ+ओघ+विनाशनः तीर्थ+राजः आस्ते। तत्र स्नाहि।' इति संभाष्य अथ सोमनाथं अब्रवीत्।५४। 'सोमनाथ, अमुं षट्कूलतीर्थे विधिवत् सचैलं (स्नानं) कारयित्वा, अश्वत्थं अर्चयित्वा द्राक् आनय।'५५।

नन्दी सांगू लागला, 'लग्नाच्या नंतरच मला हे कोड फुटले. त्याच वेळी माझे आईवडील आणि पत्नीनेही माझा त्याग केला. माझ्याकडे कुणी पाहातसुद्धा नाहीत'५१. 'माणसांचे सोडा, देवही मला उबगतात. ह्यापेक्षा मरण बरे असे वाटते. हे परमात्मा, आपण जर माझा अङ्गीकार केला नाही तर मी आता इथेच (प्रायोपवेशनाने) प्राणत्याग करीन.'५२. श्रीगुरू त्याला धीर देत म्हणाले, 'हा (पूर्वजन्मकृत) पापांतून उद्भवलेला रोग आहे. आता इतक्या दिवसात ते पाप भोगून झाले आहे. म्हणूनच तुला माझ्या ठिकाणी दृढ आणि शुद्ध भक्ती उपजली आहे.५३. 'इथे संगमावर पापांच्या राशींचा नाश करणारा तीर्थराज आहे. तिथे स्नान कर.' असे त्याला समजावून श्रीगुरू सोमनाथाला (गंगेचा पती) म्हणाले.५४. 'सोमनाथ, ह्याला संगमावर नेऊन षट्कूलांत विधिपूर्वक वस्त्रासहित स्नान करवा. तसेच अश्वत्थाची पूजाही याच्याकडून करून घ्या आणि इथे आणा.'५५.

**सोऽप्युक्तवत् कारयित्वा तमानीय गुरोः पदे । उपानयत्तमाहेशः पश्योत्तिष्ठाखिलं वपुः ।।५६।।**
**स्वर्णीभूतं स तु स्वाङ्गमुत्थायोद्वीक्ष्य विस्मितः । किञ्चित्कुष्ठाङ्किताष्ठीवद् गुरुं प्राञ्जलिरब्रवीत् ।।५७।।**
**भगवन्किं कृतं त्वेतत् कुष्ठं शिष्टं कुतोऽल्पकम् । तच्छ्रुत्वा सस्मितं प्राह त्वत्संशयफलं त्विदम् ।।५८।।**
**इत्याश्राव्य गुरोर्वाक्यं प्रणिपत्याब्रवीद्वचः । सुधाप्यम्बुधिया पीता मृतिं नयति किं दवः ।।५९।।**
**स्प्रष्टाऽवित्वाद्दहत्यल्पं स्वभावं परिहृत्य किम् । हरे स्वभावः पूर्णत्वं तवानेनैति किं वद ।।६०।।**

सः अपि उक्त+वत् कारयित्वा तं आनीय गुरोः पदे उपानयत्। तं ईशः आह, 'उत्तिष्ठ अखिलं वपुः पश्य।'५६। सः तु उत्थाय स्वर्णीभूतं स्वाङ्गं किञ्चित्+कुष्ठ+अङ्कित अष्ठी+वत् उद्वीक्ष्य विस्मितः प्राञ्जलिः गुरुं अब्रवीत्।५७। 'भगवन्, एतत् तु किं कृतम्? अल्पकं कुष्ठं कुतः शिष्टम्?' तत् श्रुत्वा सस्मितं (श्रीगुरुः) प्राह 'इदं त्वत्+संशय+फलम्।'५८। इति गुरोः वाक्यं श्रुत्वा प्रणिपत्य वचः अब्रवीत्। 'सुधा अम्बु+धिया पीता अपि मृतिं नयति किम्? दवः।५९। अवित्वात् स्प्रष्टा स्वभावं परिहृत्य अल्पं दहति किम्? हरे, तव स्वभावः अनेन पूर्णत्वं एति किम्? वद।'६०।

सोमनाथाने श्रीगुरूंच्या आदेशानुसार सर्व करून नन्दीला आणले आणि श्रीगुरूंसमोर उभे केले. त्याने साष्टांग नमस्कार केला. त्याला प्रभू म्हणाले, 'ऊठ, तुझे सर्व अंग नीट न्याहाळून पाहा.'५६. त्याने उठून आपले सर्व अंग निरोगी आणि सुवर्ण झालेले पाहिले; पण गुडघ्यावर किंचित् कोड राहिलेले दिसले.५७. तेव्हा तो काकुळतीने म्हणाला, 'भगवंता, हे आपण काय बरे केलेत? हे थोडेसेच कुष्ठ का शिल्लक ठेवलेत?' सद्गुरूंनी किंचित् स्मित केले आणि म्हणाले, 'अरे, हे तुझ्या संशयाचे फळ आहे!'५८. हे श्रीगुरूंचे वचन ऐकून नन्दी म्हणाला, 'हे पाणी आहे अशा समजुतीने अमृत प्याल्याने ते मृत्यूला कारण होईल का?'५९. 'अग्नीला अजाणता स्पर्श केला तर ते थोडे कमी भाजेल का? हे हरे, हा दोष अवशिष्ट राहिल्याने आपल्या स्वभावाला परिपूर्णता येईल का?' इथे **'हरे'** हे संबोधन हेतुपुरःसर आहे. पापाचे निर्मूलन करणारा तो हरी. हरीच्या नामात पापाचे निर्हरण करण्याची जितकी शक्ती आहे तेवढे पाप करण्याचे सामर्थ्य कुणाही पातक्याचे नाही (*नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी नरः।।* स्कंद पुराण, वैष्णव खंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३)६०.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**यद्भावो यादृशः क्वापि नान्यथा स्यात्स्वदोषतः । ग्रहीतुर्भात्यन्यथार्के जन्मान्धस्येव शून्यता ।।६१।।**
**मर्त्येन मम किं भूयादिति शङ्कोदिता त्वयि । तत्फलं त्विदमस्त्येकः प्रतीकारोऽत्र तं कुरु ।।६२।।**
**श्रुतिबृंहितया सिद्ध्येत् पुरुष्टुत्या त्वमर्त्यता । भविष्यत्यनया शुद्धिस् त्वं कृतार्थो भविष्यसि ।।६३।।**
**तच्छ्रुत्वा दीनवाग्लोलत्सर्वापघन आह तम् । स्वामिन् सर्वान्तरस्थस्त्वं किं वाच्यं तेऽग्रतः प्रभो ।।६४।।**
**लिपिमप्यक्षमो ज्ञातुं कथं स्तौमि पुरुष्टुत । अन्यत्किमपि कर्तुं मां यथास्वं विनियोजय ।।६५।।**

यत्+भावः यादृशः, न क्व अपि अन्यथा स्यात्। ग्रहीतुः स्वदोषतः जन्म+अन्धस्य अर्के शून्यता इव,अन्यथा भाति।६१। 'मर्त्येन मम किं भूयात्?' इति शङ्का त्वयि उदिता। इदं तु तत्+फलं अस्ति। अत्र एकः प्रतीकारः, तं कुरु।६२। श्रुति+बृंहितया पुरु+ष्टुत्या तु अमर्त्यता सिद्ध्येत। अनया शुद्धिः भविष्यति। त्वं कृत+अर्थः भविष्यसि।६३। तत् दीन+वाक् लोलत्+सर्व+अपघन तं आह। '(हे) स्वामिन् त्वं सर्व+अन्तर+स्थः। (हे) प्रभो, ते अग्रतः किं वाच्यम्?'६४। (हे) पुरुष्टुत, लिपिं अपि अक्षमः (अहं) कथं स्तौमि? किं अपि अन्यत् मां यथास्वं कर्तुं विनियोजय।६५।

ज्याचा जसा स्वभाव असतो तो कधीही वेगळा होत नाही. मात्र ग्राहकाच्या दोषामुळे वेगळा भासू शकतो. सूर्य स्वभावतः प्रकाशमान आहे. तो प्रकाशरहित कधीच होणार नाही. जन्मांधाला मात्र तो प्रकाश दिसू शकत नाही. हा त्याचा दोष आहे. न सूर्याचा न प्रकाशाचा.६१. तू इथे येतांना 'हा मर्त्य मानव माझा रोग काय दूर करील?' अशी शंका घेऊन आलास. हे त्याचेच फळ आहे. त्याला एक उपाय मी सांगतो तो कर.६२. उपनिषदांचा अर्थ विशद करणारी प्रगल्भ स्तुती कर. तिच्याद्वारा माझे तसेच तुझेही अमर्त्यत्व (ब्रह्मत्व) सिद्ध होईल. त्यायोगे तुझी शुद्धी होऊन तू कृतार्थ होशील.६३. तेव्हा श्रीगुरूंसमोर तो नंदी सर्वांगांनी लोळण घेत दीनवाण्या वाचेने म्हणाला, 'स्वामी, आपण सर्वांतर्यामी आहात. आपल्याला सांगायचे?'६४. 'आपली थोरामोठ्यांनी प्रगल्भ स्तुती केली आहे. मला धड लिहावाचायलाही येत नाही, मी कशी आपली स्तुती करणार? आपण दुसरे कांही मला झेपेल असे करायला सांगा.'६५.

**प्रभुः प्राह सकृद्वक्त्रान् निर्गतं न पुनर्वचः । ममान्तः प्रविशत्येव दन्तावलरदोपमम् ।।६६।।**
**उक्तमेव त्वया कार्यमित्युक्त्वा भस्म मन्त्रितम् । प्रक्षिप्य तन्मुखे प्राह स्तुहि नानाविधोक्तिभिः ।।६७।।**
**सोऽपि गीष्पतिवद्भूत्वा तं स्तोतुमुपचक्रमे । प्रेमगौरवनम्राङ्गो हर्षगद्गदया गिरा ।।६८।।**

प्रभुः प्राह। सकृत् मम वक्त्रात् निर्गतं वचः, दन्तावल+रद+उपमं, न एव पुनः अन्तः प्रविशति।६६। त्वया उक्तं एव कार्यम्। इति उक्त्वा मन्त्रितं भस्म तत्+मुखे प्रक्षिप्य आह, 'नानाविध उक्तिभिः स्तुहि।'६७। सः अपि गीष्पति+वत् भूत्वा प्रेम+गौरव+नम्र+अङ्गः हर्ष+गद्गदया गिरा स्तोतुं उपचक्रमे।६८।

प्रभू म्हणाले, 'माझ्या मुखातून एकदा बाहेर पडलेले वचन, हत्तीच्या सुळ्यांप्रमाणे, परत आत जात नाही.६६. तुला जे सांगितले आहे तेच करायला पाहिजे.' असे बोलून त्याला जवळ बोलावून श्रीगुरूंनी त्याच्या तोंडात अभिमंत्रण केलेले भस्म टाकले आणि म्हणाले, 'विविध वचनांनी माझी स्तुती कर.'६७. तो नन्दीही जणू बृहस्पतीसारखा वक्ता झाला. प्रेमभराने त्याचे अंग लवले आणि दाटलेल्या कंठाने त्याने स्तवनाला आरंभ केला.६८.

**आत्मा आणि ब्रह्म -** श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणेच तो उपनिषदांचा अर्थ स्पष्ट करणारी स्तुती करीत आहे. 'आपण **साक्षात्** - इंद्रियनिरपेक्ष अंतःस्थित असे **तत्त्व** आहात. मायेचे ईक्षण करणारे जगताचे **कर्ता** आहात. जीवमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार पोषण करणारे **भर्ता** आहात; नित्य तसेच अविनाशी आहात.' नित्य आणि अविनाशी तत्पद आपणच आहात तसेच त्वंपदवाच्य कर्ता आणि भर्ताही आहात. इथे अशी शंका घेतली की सांख्यांच्या प्रतिपादनानुसार, आत्मा असंग आहे. बुद्धीतच सर्व क्रियांचा उगम आहे. मग त्याला कर्ता कसे म्हणता येईल? बुद्धी हे जीवाचे करण (instrument) आहे. झाड तोडताना उपयोगात आणलेल्या कुऱ्हाडीला जसे कर्तत्व येत नाही तसेच बुद्धीलाही येत नाही. ब्रह्मसूत्रांतही (२:३:३३) लौकिक, वैदिक सर्व क्रियांचे कर्तृत्व जीवाचेच आहे. शास्त्रांच्या आज्ञासुद्धा जीवाला उद्देशूनच आहेत.

**साक्षात्तत्त्वमसीश त्वं कर्ता भर्ताव्ययो ध्रुवः । त्वं सर्वं खल्विदं ब्रह्मास्यात्मा साक्षी जगन्मयः ॥६९॥**
**धिया गुणैस्त्रिधाभूतात् स्वभेदात् सत्त्वलक्षणात् । भूतान्युद्भाव्य सर्वात्मन् विश्वं सृष्टं चराचरम् ॥७०॥**
**मायामयं ह्यस्वतन्त्रं वित्पात्रं कल्पितोऽत्र ना । सोऽपि त्वन्मायया भ्रान्तो भूत्वा संकल्पवान्सदा ॥७१॥**

(हे) ईश, त्वं साक्षात् तत्त्वं असि। कर्ता, भर्ता, ध्रुवः, अव्ययः (असि)। त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म आत्मा साक्षी जगत्+मयः असि।६९। धिया सत्त्व+लक्षणात् स्व+भेदात् गुणैः त्रिधाभूतात् भूतानि उद्भाव्य चराचरं विश्वं सृष्टम्।७०। माया+मयं हि अस्वतन्त्रं (विश्वम्)। अत्र वित्+पात्रं ना कल्पितः। सः अपि त्वत् मायया भ्रान्तः सदा सङ्कल्प+वान् भूत्वा,।७१।

'**तत्त्वमसि**' या महावाक्याचा उच्चार केल्यावर त्याच्या विचारासाठी शम आवश्यक आहे. म्हणून **सर्वं खल्विदं ब्रह्म** असा छांदोग्य उपनिषदांतील (३:१४:१) शमवाक्याचा निर्देश केला आहे. *तज्जलान् ज* म्हणजे जनकत्व, *ल* म्हणजे लयत्व आणि *अन्* अनन्यत्व यांच्यामुळे हे सर्व ब्रह्मच आहे. अशा ब्रह्मात रागद्वेषांचा संभवच असू शकत नाही. म्हणून त्याच्या उपासनाकाळात शांत राहावे. शांत राहून कशाचे चिंतन करावे? त्यासाठी सांगतात की व्यापक **आत्मा** चिंतनीय आहे. तो **साक्षी** म्हणचे द्रष्टा - पाहणारा आहे. तो काय पाहतो? तो हे सर्व दृश्य **जगत्** पाहतो, जे त्याच्याच अधिष्ठानावर स्थित आहे. त्याच्या सत्तेवाचून अन्य कोणतीच सत्ता नाही. म्हणून त्याला **जगन्मय** म्हटले आहे.६९.

**विश्वाची सृष्टी -** हे विश्वात्मन्, **धिया** म्हणजे जगताचे उपादान जी माया तिने युक्त अशा महत्तत्त्व नावाची समष्टी बुद्धी, तिच्यापासून सत्त्वप्रधान त्रिगुणांनी त्रिधा झालेल्या अहंकारापासून आकाशादि पंचमहाभूतांची कल्पना (रचना) केली आणि त्यांपासून हे विश्व निर्माण केले.७०.

**संसरण -** ह्या मायामय आणि परतंत्र विश्वात (आत्म)ज्ञानाची क्षमता असलेला मानव निर्माण केला. पण तोसुद्धा तुझ्या मायेला भुलून निरंतर संकल्पाच्या चक्रात सापडून,(७१)

**यात्यधो विस्मृतात्मा सत्-कर्मायत्तो वियोनिषु । भ्रमते भुक्तनिरयः कल्पेऽपि वासनाहृदा ।।७२।।**
**स्थित्वोद्भवति कल्पादौ प्राग्वत्सत्कर्मवानपि । गत्वोर्ध्वं पतति क्षीण-पुण्योऽधश्चन्द्रमण्डले ।।७३।।**
**ततोऽप्योषधिगो भूत्वा पुंसि रेतस्ततोऽप्यसौ । स्त्रीपुंयोगाच्छुक्ररक्त-मयो गर्भत्वमेत्यहो ।।७४।।**
**कललं प्राक् पञ्चरात्राद् बुद्बुदः सप्तरात्रतः । पेशी पक्षादर्बुदोऽथ भवति स्वस्थितो घनः ।।७५।।**

विस्मृत+आत्मा अधः याति। असत्+कर्म+आयत्तः भुक्त+निरयः वियोनिषु भ्रमते। कल्पे अपि वासना+हृदा।७२। स्थित्वा प्राक्+वत् सत्+कर्मवान् अपि ऊर्ध्वं गत्वा क्षीण+पुण्यः अधः चन्द्र+मण्डले पतति।७३। ततः अपि ओषधि+गः पुंसि रेतः ततः अपि असौ स्त्री+पुं+योगात् शुक्र+रक्त+मयः गर्भत्वं एति अहो। प्राक् कललं, पञ्चरात्रतः बुद्बुदः, सप्तरात्रतः पेशी, पक्षात् अर्बुदः स्वस्थितः घनः भवति।७५।

आपल्या स्वरूपाला विसरला. इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी ब्रह्मसूत्राच्या तिसऱ्या अध्यायातील प्रथम पादांत सहा अधिकरणांनी प्रतिपादलेल्या संसाराचे अनुसंधान करायला सांगितले आहे. ह्यात जीवाच्या देहांतरगमनाचे वर्णन आहे. आत्मविस्मृती झालेला हा जीव पापे करून नरक भोगतो आणि नंतर विविध योनीत फिरत राहतो. अंतःकरण वासनांनी व्याप्त असेपर्यंत तो कल्पांतापर्यंत भ्रमण करतो.७२. पुनः पुढच्या कल्पात तो पूर्वीच्याच वासना घेऊन जन्माला येतो. जर त्याच्याकडून पुण्यकर्मे झाली तर ऊर्ध्व गती लाभून तो स्वर्गात जाऊन पुण्यफळांचा भोग घेतो. ती पुण्याई संपली की परत चंद्रमंडलात पडतो.७३. चंद्रलोकापासून परतीचा, पर्जन्य, वनस्पती, पुरुषाचे रेत आणि स्त्रीचे रज हा क्रम वर सांगितला आहे. ह्या क्रमाला पंचाग्निक्रम असे नाव आहे. सूर्याच्या अग्नीत श्रद्धेचा हवि अर्पण करून सोमाची उत्पत्ती होते. वरुणाच्या अग्नीत सोमाचा हवि अर्पण करून पर्जन्याची उत्पत्ती होते. पृथ्वीच्या अग्नीत पर्जन्याचा हवि अर्पण करून अन्नाची उत्पत्ती होते. पुरुषाच्या अग्नीत अन्नाची आहुती घालून रेताची उत्पत्ती होते. आणि स्त्रीरूपी अग्नीत रेताची आहुती टाकल्याने गर्भाची उत्पत्ती होते. यापुढील श्लोकात केलेले गर्भधारणा आणि गर्भसंवर्धनाचे संक्षिप्त वर्णन बऱ्याच प्रमाणात आधुनिक गर्भवृद्धिशास्त्राशी जुळते.७४. क्रमाने शुक्र आणि शोणिताच्या संयोगाने झालेला हा गर्भ पहिल्या दिवशी कलल (amorphous), पाच रात्रीतून बुडबुडा, सात रात्रींनी अंडाकार, पंधरा दिवसांनी पिशवीसारखा होऊन षट्कोशांत स्थिरावतो आणि घन (viscid) होतो.७५.

**मासा क्रूरः शिरो द्वाभ्यां ग्रीवाद्यङ्गानि च त्रिभिः । चतुर्भिस्त्वग्रोमनखाः पञ्चभिः षड्भिरप्यथ ॥७६॥**
**नासास्याक्ष्यादिरन्ध्राणि सप्तभिश्चलनं च धीः । अष्टभिर्नवभिः पूर्णो देही भूत्वेश्वरं जगौ ॥७७॥**
**जातो मृतः शश्वदहं वियोनीर्-मयोषिता भक्तिपराङ्मुखेन ।**
**अवाङ्मुखं देव जरायुवीतं मामुद्धर त्रस्तमितो भजे त्वाम् ॥७८॥**
**एवं स्तुत्वा सूतिवायु-त्यक्तो विस्मृतलब्धधीः । रोरूयति जनुर्लब्ध्वा मोहितो माययेश ते ॥७९॥**
**अनभिप्रेतमापन्न आसनोत्थानचेष्टने । पराधीनतया भुङ्क्ते स व्यथां वक्तुमक्षमः ॥८०॥**

मासा क्रूरः, द्वाभ्यां शिरः, च त्रिभिः ग्रीवादि अङ्गानि, चतुर्भिः त्वक्, पञ्चभिः रोम+नखाः, अथ षड्भिः।७६। नासा, अक्षि आदि रन्ध्राणि, सप्तभिः चलनं, अष्टभिः धीः, नवभिः पूर्णः देही भूत्वा ईश्वरं जगौ।७७। अहं शश्वत् जातः, मृतः। मया भक्ति+पराक्+मुखेन वियोनीः उषिताः। (हे) देव, अवाक्+मुखं जरायु+वीतं त्रस्तं मां इतः उद्धर। त्वां भजे।७८। एवं स्तुत्वा सूति+वायु+त्यक्तः जनुः लब्ध्वा विस्मृत+लब्ध+धीः ते मायया मोहितः रोरूयति।७९। वक्तुं असमर्थः पर+अधीन+तया आसन+उत्थान+चेष्टने अन्+अभिप्रेतं आपन्नः सः व्यथां भुङ्क्ते।८०।

एका महिन्यात त्याला काठिण्य येते, दोन महिन्यांत मस्तक, तीन महिन्यांत गळा इत्यादि अवयव, चार महिन्यांनी त्वचा, पाच महिन्यांनी रोम आणि नखे, सहा महिन्यांत(७६) नाक, डोळे इत्यादि छिद्रे, सात महिन्यांत हालचाल, आठ महिन्यांत पूर्वसंस्कारांनी युक्त निश्चयात्मिका बुद्धी प्राप्त होऊन नऊ महिन्यांत तो सर्वांगपरिपूर्ण देह धारण करतो आणि ईश्वराची प्रार्थना करतो.७७. 'देवा, मी तुझ्या भक्तीकडे पाठ फिरवून किती वेळा तरी जन्मलो आणि किती तरी वेळा मरण पावलो. नाना नाना योनींत कष्ट भोगले. आता मी खाली तोंड करून ह्या जारांत गुंडाळलेला गर्भाशयात त्रासून गेलो आहे. इथून माझी सुटका कर. मी तुझी भक्ती करीन.'७८. अशी स्तुती करून तो प्रसूतीच्या वायूद्वारा गर्भाशयातून बाहेर ढकलला जातो. जन्म झाल्याबरोबर त्याला आधी मिळालेली बुद्धी विसरून जातो आणि तुझ्या मायेच्या भुलीने रडायला लागतो.७९.

**ततोऽपि क्रीडनासक्तो वयस्यैरज्ञभावगः । तारुण्ये विषयासक्तो मत्तो दुर्जनसङ्गतः ।।८१।।**
**देवमायां स्त्रियं प्रेक्ष्य तद्भावैरजितेन्द्रियः । भोगोत्सुकः खलोऽज्ञात-कार्याकार्यो दुरध्वगः ।।८२।।**
**वार्धक्ये स्वजनत्रस्तो रुग्णोऽस्वस्थो जराकृशः । श्वासकासकफाविष्टः सम्भवत्यजितेन्द्रियः ।।८३।।**
**शतायुरपि रात्र्यार्धं हृतं शिष्टमपीदृशम् । कथंकारं नृजन्मापि श्रेष्ठं भक्त्या विना त्वयि ।।८४।।**

ततः अपि अज्ञ+भाव+गः वयस्यैः क्रीडन+आसक्तः। तारुण्ये विषय+आसक्तः मत्तः दुर्जन+सङ्गतः।८१। अजित+इन्द्रियः देव+मायां स्त्रियं प्रेक्ष्य तत्+भावैः भोग+उत्सुकः खलः अज्ञात+कार्य+अकार्यः दुः+अध्वगः।८२। वार्धक्ये स्वजन+त्रस्तः रुग्णः अस्वस्थः, अजित+इन्द्रियः श्वास+कास+कफ+आविष्टः संभवति।८३। शतायुः अपि रात्र्या अर्धं हृतम्। शिष्टं अपि ईदृशम्। नृजन्म अपि त्वयि भक्त्या विना कथंकारं श्रेष्ठम्।८४।

त्या नवजात तान्ह्याला आपल्याला काय हवे नको ते बोलताही येत नाही. उठणे, बसणे, चालणे या सर्व गोष्टींत तो पराधीन असतो. त्याला हवे असते एक आणि मिळते भलतेच. अशा अवस्थेत होणाऱ्या व्यथा तो भोगीत असतो.८०. त्यानंतर बाल्यावस्थेत तो अजाणच असतो. सवंगड्यांबरोबर खेळण्यातच मग्न असतो. तारुण्यात विषयांची अनिवार ओढ, धनजनाची मस्ती, दुर्जनांची संगती,(८१) इंद्रियवशता यांमुळे ईश्वरी मायेचेच रूप असलेल्या स्त्रियांना पाहून भोगाच्या लालसेने पेटलेला असतो. अशा रीतीने त्याचा कार्य आणि अकार्य यांचा विवेकही नष्ट होतो आणि तो वाकड्या मार्गाला लागतो.८२. म्हातारपणी आपलेच म्हणवणारे त्याला त्रासून टाकतात. रोग आणि अस्वस्थता त्याचा जीव नकोसा करतात. इंद्रियांवर ताबा नसतोच. त्यामुळे दमा, खोकला, कफ यांचा प्रादुर्भाव होतो.८३. माणसाचे आयुष्य अगदी शंभर वर्षे धरले तरीही रात्री झोपण्यातच निम्मे निघून जाते. उरलेल्याचीही गती ही अशी होते. हा मनुष्यजन्म शास्त्रांनी आणि पुराणांनी नावाजलेला असला तरी देवा, तुझ्या भक्तीवाचून तो कसा श्रेष्ठत्वाला पोचेल?८४.

**तत्साफल्यं नवविध-त्वद्भक्त्यासक्तसङ्गतिः । त्वयि भक्तिः साधने द्वे त्वां याचे भक्तवत्सल ।।८५।।**
**भो जनात्रावतीर्णोऽयं सद्धर्मत्राणकारणः । परमात्मा परं ब्रह्म लीलाधाम्नैष नो नरः ।।८६।।**
**सेव्यताममृतत्वाय योगैर्वा श्रवणादिना । भजतोऽनुभजत्येष भगवान् भक्तिभावनः ।।८७।।**
**यथा तृणौघोऽग्निस्पर्शाद् भस्मसाज्जायते तथा । निःशेषाघं कृपांशेन निर्दग्धं मेऽमुना तथा ।।८८।।**
**भगवन् कति ते वाच्या वाङ्मनोऽविषया गुणाः । श्रुत्या नेतीति सिद्धेपि श्रद्धावद्योगिगोचर ।।८९।।**

(हे) भक्तवत्सल, तत्+साफल्यं नवविध+त्वत्+भक्ति+आसक्त+सङ्गतिः (च) त्वयि भक्तिः द्वे साधने त्वां याचे।८५। 'भो जनाः। अयं परं+आत्मा परं ब्रह्म, लीला+धाम्ना सत्+धर्म+त्राण+कारणः अत्र अवतीर्णः। एष नो नरः।८६। योगैः वा श्रवणादिना (भवद्भिः) सेव्यताम्। एष भक्तिभावनः भजतः अनुभजति।८७। यथा तृण+ओघः अग्नि+स्पर्शात् भस्मसात् जायते तथा अमुना कृपा+अंशेन मे निःशेष+अघं निर्दग्धम्'।८८। '(हे) भगवन्! (हे) श्रद्धावत्+योगि+गोचर, श्रुत्या 'न इति' इति सिद्धे अपि (ते रूपे) ते वाक्+मनः+ अविषयाः गुणाः कति वाच्या?'।८९।

भक्तांच्या जिवलगा, त्या नरजन्माचे सार्थक, तुझे श्रवण, कीर्तन, स्मरण, सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि तुला आत्मनिवेदन अशा नवविध भक्तीत रंगलेल्यांची संगती (१) आणि तुझी भक्ति (२) हीच दोन साधने आहेत. ती मला लाभोत हीच याचना तुझ्या चरणी करीत आहे.८५.

'लोक हो! ह्या श्रीगुरूंना सामान्य माणूस असे समजू नका. हा साक्षात् परमात्मा आहे. अतीव प्रेमास्पद असल्याने हाच परब्रह्महीही आहे. हा साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी लीलादेह धारण करून आला आहे. (ह्या विशेषणांनी त्यांच्या अवताराचे प्रयोजन आकार घेण्याचे कारणही सांगितले आहे.)८६. म्हणून सर्वांना माझे सांगणे आहे की अष्टांगयोगाने, निष्काम कर्मयोगाने किंवा श्रवणादि भक्तीने याची उपासना करा. कारण हा भक्तिभावन आहे; भजन करणाऱ्यांवर अनुग्रह करणारा आहे. *भजन* याचा अर्थ *निरंतर स्मरण, अनुसंधान.* भ.पू. पा. शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र भाष्यात म्हटल्याप्रमाणे 'दूरदेशी गेलेल्या पतीचे ज्या उत्कंठेने पत्नी स्मरण करते,'

**इत्यादिना बहु स्तुत्वा पदोः प्रणिपपात सः । शिष्टं कुष्ठं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः ।।९०।।**
**तत्रैव स्थापयामास तं दत्त्वेष्टं वरं प्रभुः । सोऽप्यानीय वधूं स्थित्वा व्यरचद्विविधाः कथाः ।।९१।।**

इति आदिना सः पदोः प्रणिपपात। तदा शिष्टं कुष्ठं विशिष्ट+इष्ट+सुतष्टितः नष्टम्।९०। तं इष्टं वरं दत्वा प्रभुः तत्र एव स्थापयामास। सः अपि वधूं आनीय स्थित्वा विविधाः कथाः व्यरचत्।९१।

तीच उत्कंठा इथे अभिप्रेत आहे. भक्तिशास्त्रमय बुद्धीने ईश्वराशी तादात्म्य पावलेल्या अभिमानाने भक्तिविषयात दीर्घकाल स्थिरावणे ह्यालाच उपासना असे नाव आहे. ह्या तादात्म्यावस्थेतूनच आनंद प्रकटतो. 'समाधीने सर्व चित्ताचे मल धुवून टाकल्यावर आत्म्यांत प्रविष्ट झाल्याने जे सुख होते ते अंतःकरणातच भोगता येते, वाणीने वर्णन करण्याजोगे नाही' असे पंचदशीत (११:११८) म्हटले आहे ते याच अर्थाने (*समाधिर्निधूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत्। न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते।।*).८७. 'गवताची बनीम आगीच्या एका ठिणगीने जळून जावी तसे माझ्या पापाचे डोंगर ह्या श्रीगुरूंच्या कृपालेशाने निःशेष भस्मसात् केले आहेत.'८८. या श्लोकात श्रद्धावान् योग्यांच्याच दृष्टी पडणारा असे संबोधन हेतुगर्भ आहे. वेदांनी सुद्धा 'स्थूल नाही, अणु नाही', 'नाही नाही, असे नाही' असा निर्णय केलेले मन-वाणीला अगोचर असे तुझे गुण किती म्हणून गावेत?'८९ अशा प्रकारे नानाविध स्तोत्रांनी श्रीगुरूंचे स्तवन करून नन्दीने त्यांच्या चरणांवर दंडवत घातला. तेव्हा विशेष विद्वानांनाच इष्ट असणारा तो श्रीगुरुनाथ प्रसन्न झाला आणि त्या नंदीचे उरलेसुरले कोडही नाहीसे झाले. मनुस्मृतीत शिष्ट शब्दाची व्याख्या 'ज्यांनी वेद आणि वेदांगाचा धर्मानुसार अभ्यास केला ते ब्राह्मण' अशी केली आहे (*धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः। ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः।।* १२.१०९।।).९०.

त्याला हवा असलेला वर देऊन नृसिंहप्रभूंनी तिथे गाणगापुरांतच त्याना राहवून घेतले. नन्दीही आपल्या कुटुंबाला घेऊन तिथे स्थायिक झाला आणि श्रीगुरूंच्या स्तवनपर अशी काव्ये केली.९१.

**कवितां प्रसृतां लोके तस्य ज्ञात्वा नृकेसरी । कश्चित्कविरमंस्तेयं गर्ह्योदारापि नृस्तुतिः ।।९२।।**
**तद्ग्रामे केनचिन्नीतो गुरुस्तस्मै व्यदर्शयत् । उपास्यकल्लेशलिङ्गस्थं स्वं रूपं हृदर्चने ।।९३।।**
**पञ्चभिस्तं नवैः श्लोकैर् नित्यवन्मानसार्चने । स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह क्वास्ते कल्लेश्वरो वद ।।९४।।**
**तच्छ्रुत्वा स तदा ध्यानं विसृज्य भगवान्स्वयम् । नृरूपेणावतीर्णोऽयमिति मत्वान्वगाद्गुरुम् ।।९५।।**

तस्य कवितां लोके प्रसृताम्। ज्ञात्वा कश्चित् नृकेसरी कविः उदारा अपि अयं नृ+स्तुतिः गर्ह्या अमंस्त।९२। तत् ग्रामे केनचित् नीता गुरुः तस्मै उपास्य+कल्लेश+लिङ्ग+स्थं स्वं रूपं हृत्+अर्चने व्यदर्शयत्।९३। नित्यवत् मानस+अर्चने पञ्चभिः नवैः श्लोकैः स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह। 'ते कल्लेश्वर क्व आस्तेः? वद।'९४। तत् श्रुत्वा सः तदा ध्यानं विसृज्य 'अयं स्वयं भगवान् नृरूपेण अवतीर्णः,' इति मत्वा गुरुं अन्वगात्।९५।

त्याची कविता सर्व लोकात प्रसार पावली. नरकेसरी नावाच्या एका कवीच्या कानांवर त्या कविता पडल्या. 'कविता चांगल्या आहेत त्या मानवाच्या स्तुतीपर असल्याने निंद्यच आहेत,' असा विचार त्याच्या मनात आला.९२. एकदा कुणी भक्ताने श्रीगुरूंना नरकेसरीच्या गावी आणले असता तो आपल्या नित्यनेमानुसार कल्लेश्वराची पूजा करीत होता. त्या वेळी त्याला कल्लेश्वराच्या जागी श्रीगुरूच दिसू लागले.९३. रोजच्या नियमानुसार मानसपूजेत पाच नवीन रचलेल्या श्लोकांनी त्याने स्तुती केली. तेव्हा श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे, तुझा कल्लेश्वर कुठे आहे? सांग!'९४. ते ऐकून नरकेसरीने ध्यान विसर्जित केले आणि 'हे तर प्रत्यक्ष भगवंतच मानवरूपाने अवतरले आहेत,' असा निश्चय करून तो श्रीगुरूंकडे निघाला.९५.

**नृकेसरिर्गुरुं प्राप्य रचितैः पञ्चभिः शुभैः । श्लोकैस्तुष्टाव तं प्राह हित्वेशं स्तौषि किं नरम् ।।९६।।**

**।। नरकेसर्युवाच ।।**

**भवान्मयाज्ञभावेन मानुषो लौकिको मतः । कृपयापास्य मेऽज्ञानं सत्त्वं रूपं प्रदर्शितम् ।।९७।।**
**तेन नष्टोऽद्य मे मोहस्त्वत्प्रसादाज्जनार्दन । प्राक्पुण्यं फलितं मेऽदः शिष्यालौ मां नियोजय ।।९८।।**
**भगवानपि सुप्रीतस् तस्मै दत्वांशुकं वरम् । प्राह कल्लेश्वरं विप्र भज तत्रापि मत्स्थितिः ।।९९।।**
**स प्राह भगवन्तेऽदः प्रत्यक्षं रूपमुत्तमम् । हित्वोत्सहे न गन्तुं मां त्वत्पादाब्जे स्थिरीकुरु ।।१००।।**

नृकेसरिः गुरुं प्राप्य पञ्चभिः शुभैः रचितैः श्लोकैः तुष्टाव। तं प्राह 'ईशं हित्वा नरं स्तौषि किम्?'९६। नरकेसरि उवाच। 'मया अज्ञ+भावेन भवान् लौकिकः मानुषः मतः। कृपया मे अज्ञानं अपास्य सत्त्वं रूपं प्रदर्शितम्।९७। (हे) जनार्दन, तेन त्वत् प्रसादात् मे मोहः नष्टः। अदः मे प्राक् पुण्यं फलितम्। मां शिष्य+आलौ नियोजय।'९८। भगवान् अपि सुप्रीतः तस्मै वरं अंशुकं दत्वा प्राह, '(हे) विप्र, कल्लेश्वरं भज। तत्र अपि मत्+स्थितिः।'९९। सः प्राह। '(हे) भगवन्त, इदं प्रत्यक्षं उत्तमं रूपं हित्वा गन्तुं न उत्सहे। त्वत्+पाद+अब्जे स्थिरीकुरु'।१००।

नरकेसरीने श्रीगुरूंच्याकडे येऊन त्यांची आपण रचलेल्या पाच श्लोकांनी स्तुती केली. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे ईश्वराला सोडून मानवाची काय स्तुती करतोस?'९६. नरकेसरी उत्तरला, 'देवा, मी अज्ञानवश आपल्याला लौकिक माणूसच समजलो. आपणच कृपेने माझे अज्ञान निरसून सात्त्विक ज्ञानमय रूप दाखविले आहे.'९७. 'जनार्दना, त्या तुझ्या कृपाप्रसादाने माझा मोह नष्ट झाला आहे. हे माझे पूर्वपुण्यच फळाला आले आहे. मला आता आपण आपल्या शिष्यपंक्तीत मिळवून घ्यावे.'९८. भगवान् श्रीगुरूंनी प्रसन्न होऊन त्याला प्रीतीपूर्वक उत्तम वस्त्र दिले आणि म्हणाले, 'कल्लेश्वराचीच उपासना कर. त्यातही माझेच अस्तित्व आहे.'९९. नरकेसरी म्हणाला, 'आपले हे प्रत्यक्ष उत्कृष्ट रूप सोडून मला कुठेही जावेसे वाटत नाही. मला आपल्या पदकमलातच स्थिर करा!'१००.

**मद्धाम्न्याप्तोऽस्यनायासाद् भगवन् भक्तकामधुक् । दयाब्धे मा कुरूपेक्षां दयनीयतमस्य मे ।।१०१।।**
**इत्युक्त्वा स पपाताग्रे तमाश्वास्य दयानिधिः । शिष्यत्वेनोररीकृत्य स्वात्मसौख्यमुपादिशत् ।।१०२।।**
**एवं भूत्वा कवी द्वौ तौ संग्रथ्य हरिसत्कथाः । तत्कीर्तनाच्छ्रद्धयात्र कृतकृत्यौ बभूवतुः ।।१०३।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ।।**

**आदितः एकविंशोऽध्यायः ।। सप्ताहपारायणे षष्ठः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

'(हे) भक्त+काम+धुक् भगवन् अन+आयासात् मत्+धाम्नि आप्तः असि। (हे) दया+अब्धे, मे दयनीय+तमस्य उपेक्षां मा कुरु।'१०१। इति उक्त्वा सः अग्रे पपात। दयानिधिः तं आश्वास्य, शिष्यत्वेन उरीकृत्य स्व+आत्म+सौख्यं उपादिशत्।१०२। एवं तौ द्वौ कवी भूत्वा हरि+सत्+कथा संग्रथ्य श्रद्धया तत् कीर्तनात् कृतकृत्यौ बभूवतुः।१०३।

भगवंता, भक्ताची जणू कामधेनु असे आपण अनायासच माझ्या दारी आलेला आहात. दयासागरा, ह्या अतीव दयनीय अशा माझी उपेक्षा करू नका.१०१. असे बोलून त्या नरकेसरीने श्रीगुरूंच्या चरणी आपले शरीर झोकून दिले. तेव्हा श्रीगुरूंनी त्याला आश्वासन देऊन त्याचा शिष्य म्हणून स्वीकार केला आणि त्याला स्वात्मसौख्याचा उपदेश केला.१०२. असे हे दोन कवी होऊन गेले. श्रीगुरूंच्या पावन लीला त्यांनी ग्रथित केल्या आणि श्रद्धापूर्वक त्यांच्या कीर्तनाने ते कृतकृत्य झाले.१०३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा तिसरा आणि प्रथमपासून एकविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ द्वाविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**श्रुतो गुणानुवादोऽपि हरेस्तृप्तिर्न मे गुरोः । अतीव वर्धते तृष्णा शश्वच्छ्रवणपानतः ।।१।।**
**भवाननलसो नूनमुदारतम एव मे । पूर्वश्रेयःप्रभावेन सङ्गतोऽस्ति कृपाकरः ।।२।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**गुणानुवादक्षीराब्धेः कति पासि कथामृतम् । सच्चित्सुखस्य लीलानुरनन्तस्य परात्मनः ।।३।।**

नामधारक उवाच। हरेः गुरोः गुण+अनुवादः श्रुतः अपि मे तृप्तिः न। श्रवण+पानतः शश्वत् अतीव तृष्णा वर्धते।१। मे पूर्व+श्रेय+प्रभावेन भवान् अन्+अलसः उदार+तमः कृपा+करः सङ्गतः अस्ति।२। सिद्ध उवाच। सत्+चित्+सुखस्य नुः लीला+ अनन्तस्य परात्मनः गुण+अनुवाद+क्षीर+अब्धेः कथा+अमृतं कति पासि?३।

श्रीगणेशाय नमः। *बाविसीं आठ तनू धरुनि। आठहि गांवी दिवाळी करुनी। शूद्रशेती अमाप पिकवुनि। गाणगापुरची तीर्थे प्रकटविली।।१।।* नामधारक म्हणतात, 'आपल्या मुखातून इतका काळ पापतापहर श्रीगुरूंच्या गुणामृताचे कर्णाद्वारे सतत पान करूनही माझी तृप्ती कांही होतच नाही. उलट त्या अमृतपानाची तृष्णा वाढतच आहे.'१. 'आपल्यासारखा कृपाळू, दातार, निरलस वक्ता मला लाभला ही माझी पूर्वपुण्याईचा फळाला आली आहे!'२. सिद्ध म्हणतात, 'सच्चिदानंद, अनंत, परमात्म्याने मायामानुष रूपाने केलेल्या लीलांच्या गुणानुवादाच्या क्षीरसागरातले कितीसे कथारूपी अमृत तू पिऊ शकशील?' त्या कथामृताचे निःशेष पान तूच काय पण कुणीच करू शकणार नाही, असा त्यांचा अभिप्राय आहे. इथे सिद्धमुनींनी श्रीगुरूंचे परब्रह्मत्व निर्देशिले आहे.३.

**गुणान्कात्स्न्येंन वक्तुं न क्षमः कोऽपीशितुस्त्वहम् । उच्चावचखगोड्डान-न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।४।।**
**स भीमामरजातीर-विहारी भक्तवत्सलः । भक्ताधीनत्वमाश्रित्य सदाभूत्तन्मतानुगः ।।५।।**
**निराकारो निरीहोऽपि शुद्धसत्त्वस्वरूप्यजः । बुद्ध्या सङ्गत्य लीलार्थं स्वयं विश्वात्मकोऽभवत् ।।६।।**
**सर्वत्र स्थितिमांस्त्वेष पश्येयुर्मुनयो हि माम् । इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः ।।७।।**

कः अपि गुणान् कार्त्स्येन वक्तुं न क्षमः। अहं तु उच्च+अवच+खग+उड्डान+न्यायेन यथामति वक्ष्ये।४। सः भीमा+अमरजा+तीर+विहारी भक्तवत्सलः भक्त+अधीनत्वं आश्रित्य सदा तत्+मत+अनुगः अभूत्।५। निः+आकारः निः+ईहः शुद्ध+सत्त्व+स्वरूपी अजः अपि स्वयं लीला+अर्थं बुद्ध्या सङ्गत्य विश्व+आत्मकः अभवत्।६। एष तु सर्वत्र स्थिति+मान्, 'मां मुनयः पश्येयुः' इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः।७।

त्याचप्रमाणे त्या भगवद्गुणांचे वर्णन पूर्णपणे करणे कुणालाही शक्य नाही. अनंत आकाशात आपापल्या शक्त्यनुसार कमी अधिक उंचीची झेप घेणाऱ्या पक्षांप्रमाणे मी यथामती सांगत आहे.'४. 'भीमा आणि अमरजा यांच्या तीरावर भक्तांच्या उद्धाराची लीला करणारा तो भक्तवत्सल श्रीगुरू भक्तांच्या अधीन होऊन नेहमी त्यांच्या मतानुसार वागत असे.'५. सद्गुरू भगवान् भक्तांच्या मर्जीने वागतात तर त्यांना साकार म्हणावे की निराकार? या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मसूत्रानुसार (३ः२ः११) असेच द्यावे लागेल की ते न तर साकार आहे न निराकार. तत्त्वतः अरूपच आहे. साकार वा निराकार रूपाची कल्पना उपासनेच्या संदर्भात केली जाते. असे हे अरूप, संकल्परहित, शुद्धसत्त्वस्वरूप, निर्विकार परब्रह्म लीलेसाठी म्हणून महत्तत्त्वाशी मिळून विश्वात्मक झाले.६. सनकादिक मुनींना दृग्गोचर होण्यासाठी त्यांनी ब्रह्मा, विष्णू, महेश ही तीन रूपे धारण केली आणि सत्य, वैकुंठ आणि कैलास या तीन लोकांत राहिले.७.

**तत्रापि भुवि मे भक्ता भूयांसो मन्मयास्त्वहम् । तेषामगोचरोऽस्म्यस्मात् स्थेयं तत्रेत्यमंस्त सः ।।८।।**
**ततोऽत्र भगवान् भूमौ लीलाधाम्ना युगे युगे । भजतोऽनुभजत्येष श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।९।।**
**किं वर्ण्यते भगवतो भक्तवात्सल्यमद्भुतम् । परिपूर्णोऽपि सन्तृप्तो भोक्तुं भ्रमति तद्गृहे ।।१०।।**
**अन्या अपि तु तल्लीलास् तादृश्यः सन्त्यनन्तशः । स्वकृते तु न ता विद्धि भक्तानुग्रहलक्षणाः ।।११।।**
**कलौ घोरेऽत्र नो भाग्यमुदितं हि युगे युगे । दुर्लभस्तपसापीशः स्मृत्यैव सुलभोऽत्र नुः ।।१२।।**

तत्र अपि 'भुवि मे मन्मया भक्ताः भूयांसः। अहं तु तेषां अगोचरः अस्मि। अस्मात् तत्र स्थेयं' इति सः अमंस्त।८। ततः भगवान् अत्र भूमौ युगे युगे लीला+धाम्ना (अवतीर्य) भजतः अनुभजति। एष प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।९। भगवतः अद्भुतं भक्तवात्सल्यं किं उ वर्ण्यते? परिपूर्णः संतृप्तः अपि तत् गृहे भोक्तुं भ्रमति।१०। तादृश्यः अन्या अपि तु तत्+लीलाः अनन्तशः सन्ति। ता न तु स्व+कृते, भक्त+अनुग्रह+लक्षणाः विद्धि।११। अत्र घोरे कलौ नः भाग्यं हि उदितम्। युगे युगे तपसा अपि दुर्लभः ईशः अत्र नुः स्मृत्या एव सुलभः।१२।

त्यातही 'भूलोकात माझे किती तरी मन्मय झालेले भक्त आहेत त्यांना मात्र माझे दर्शन होत नाही, तिथेही मला जायला पाहिजे' अशी करुणा त्यांच्या मनांत उपजली.८. तेवढ्यासाठी भगवंत ह्या भूलोकावर लीलादेह धारण करून युगांयुगांतून अवतरून आपल्या भक्तावर अनुग्रह करीत असतो. कारण याला श्रद्धा आणि भक्ती फार आवडतात.९. या भगवंताचे भक्तवात्सल्य किती म्हणून वानावे? हा स्वयं परिपूर्ण आहे आणि सदैव तृप्त आहे. तरीही त्या भक्तांच्या दारोदार भिक्षेच्या निमित्ताने हिंडत असतो!१०. 'अशाच त्या प्रभूच्या अगणित लीला आहेत. पण त्या सर्वही तो स्वतःसाठी नव्हे तर भक्तांवर अनुग्रह करण्याच्या हेतूनेच करतो हे ध्यानात ठेव.११. ह्या घोर कलियुगात आपले भाग्य खरेच उगवले आहे; इतर युगात तपादि सायासांनीसुद्धा दुर्लभ असलेला हा ईश्वर मानवांना केवळ स्मरणमात्रे सुलभ झाला आहे.'१२.

**स एष भगवांस्तत्र भक्ताधीनतयान्वहम् । निमन्त्रितो भक्तगेहे भिक्षान्नं बुभुजे प्रभुः ।।१३।।**
**दीपावल्युत्सवे सप्त प्रिया भक्ता जगद्गुरुम् । स्वे स्वे गृहे नेतुकामा भिन्नवासाः समाययुः ।।१४।।**
**भवन्तं नेतुकामोऽद्य दीपाल्यां पञ्चवासरम् । प्राप्तोऽस्म्यद्यैव गन्तव्यमित्येकैकोऽब्रवीद् गुरुम् ।।१५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यूयं सप्तैक एवाहमेककालीन उत्सवे । सप्तग्रामेष्वेकदैव कथं मे गमनं भवेत् ।।१६।।**
**एकत्रैकैकघस्रे वा गतिरेकैकसद्मनि । सम्भवेच्चेत्कृतं तद्वद् भवद्भिर्मे वरं द्विजाः ।।१७।।**
**भक्ताधीनोऽस्मि मां यो यो नयेद्यास्यामि तत्र च । तच्छ्रुत्वान्योन्यं कलहं चक्रुर्नेष्याम्यहं त्विति ।।१८।।**

सः एष भगवान् प्रभुः तत्र भक्त+अधीनतया अनु+अहं भक्त+गेहे निमन्त्रितःभिक्षा+अन्नं बुभुजे।१३। सप्त प्रियाः भिन्न+वासाः भक्ताः दीपावलि+उत्सवे स्वे स्वे गृहे नेतु+कामाः समाययुः।१४। एक+एकः गुरुं अब्रवीत्। 'अद्य भवन्तं दीपाल्यां पञ्चवासरं नेतु+कामः प्राप्तः अस्मि। अद्य एव गन्तव्यम्।'१५। श्रीगुरुः उवाच। 'यूयं सप्त, एक एव अहं, एक+कालीन उत्सवे सप्त+ग्रामेषु एकदा एव मे गमनं कथं भवेत्?१६। एकत्र, एक+एक+सद्मनि एक+एक+घस्रे वा गतिः सम्भवेत्। (हे) द्विजाः, भवद्भिः तत्+वत् कृतं चेत् मे वरम्।'१७। भक्त+अधीनः अस्मि। यः यः मां नयेत् तत्र च यास्यामि। तत् श्रुत्वा अन्यः अन्यं 'अहं तु नेष्यामि' इति कलहं चक्रुः।१८।

तोच हा भगवंत त्या गाणगापुरात भक्तपराधीन होऊन रोज ज्याचे आमंत्रण असेल त्या भक्ताच्या भिक्षेचे अन्न तो प्रभू जेवत असे.१३. एका दिवाळीच्या सणाला सात वेगवेगळ्या गावचे सात प्रिय भक्त जगद्गुरूंना आपापल्या घरी घेऊन जाण्याच्या इच्छेने आले.१४. प्रत्येक जण येऊन श्रीगुरूंना म्हणू लागला, 'महाराज, आज मी आपल्याला दिवाळीचे पाच दिवस आमच्या घरी नेण्यासाठी आलो आहे. आजच निघायला हवे!' श्रीगुरूंनी सर्वांना समजावले, 'हे पाहा, तुम्ही सात जण आहा आणि मी तर एकटाच आहे. एकाच वेळी दिवाळीसाठी सात गावी जाणे कसे शक्य आहे?१६. एक तर तुम्ही सगळे दिवाळी एकत्रच करा किंवा मी एकेका दिवशी एकेकाच्या घरी जाईन. अशी कांही योजना तुम्ही कराल तर मला बरे वाटेल.१७. 'मी केवळ भक्तपराधीन आहे. जो माझा भक्त जिथे कुठे मला घेऊन जाईल तिथे मी येईन.' श्रीगुरूंचे बोलणे ऐकून सगळे आपापसात 'श्रीगुरूंना मीच नेणार' 'नाही मीच नेणार' असे वादू लागले.१८.

**निःस्वो धनीति द्वैतान्मां मा पाहि ह्यसि भो समः । भूतमात्रेऽत एहीति प्रोक्त्वा ते पतिताः पुरः ।।१९।।**
**निवार्य तान्सर्वगृहानेष्यामीत्युदितेऽपि ते । कैर्विश्वस्तव्यमित्यूचुर्भ्रान्ताः श्रीगुरुमीश्वरम् ।।२०।।**
**भगवानपि तद्भावं ज्ञात्वैकैकं रहो द्विजम् । सस्मितास्यः समाहूय प्राहोदारगिरा मुदा ।।२१।।**
**न वाच्यं क्वापि तेऽद्यैव गृहमेष्ये चरेत्यथ । तेऽपि सप्तैवमन्योन्यमशंसंतो ययुर्गृहान् ।।२२।।**

'भो निः+स्वः धनी इति द्वैतात् मां मा पाहि। भूतमात्रे समः असि। अत एहि।' इति प्रोक्त्वा ते पुरः पतितः।१९। तान् सर्वान् निवार्य, 'सर्व+गृहान् एष्यामि,' इति उदिते अपि ते भ्रान्तः ईश्वरं गुरुं ऊचुः, 'कैः विश्स्तव्यम्?' इति।२०। भगवान् अपि तत्+भावं ज्ञात्वा एके+एकं द्विजं रहः स+स्मित+आस्यः समाहूय उदारगिरा मुदा प्राह।२१। 'अद्य एव ते गृहे एष्ये। क्व अपि न वाच्यम्! चर।' इति। एवं ते सप्त अपि अन्यः अन्यं अशंसन्तः गृहान् ययौ।२२।

शेवटी सगळेच श्रीगुरूंना आपापल्या परीने गळ घालू लागले. 'भगवन्, अमुक गरीब, अमुक श्रीमंत असा भेद करू नका. आपण सर्व जीवांसाठी सम आहात. माझ्या घरी या.' असे म्हणून सगळ्यांनी श्रीगुरूंच्या समोर दंडवत घातले.१९. मग शेवटी त्या सर्वांना कसेबसे शांत करून श्रीगुरू म्हणाले, 'असे भांडू नका. मी सर्वांच्याच घरी येणार आहे!' श्रीगुरूंनी असे आश्वासन देऊनही, 'सर्वांनाच येतो म्हणता, मग कुणी विश्वास ठेवावा?' असे म्हणून त्यांनी साक्षात् परमेश्वरस्वरूप श्रीगुरूंवरच अविश्वास दाखविला.२०. आपल्या भक्तांची अंतरे जाणणाऱ्या भगवंताने हसऱ्या चेहऱ्याने, एकेका ब्राह्मणाला एकांतात बोलावून गंभीरपणे सांगितले,(२१) 'आजच मी तुझ्या घरी येणार आहे. कुणालाही सांगू नकोस! गुपचुप घरी जा.' अशा रीतीने ते सातही भक्त एकमेकांशी न बोलता मुकाट्याने आपापल्या घरी निघून गेले.२२.

**तत्रत्यैः क्व भवान् याति नो हित्वेत्युदितेऽत्र तु । तिष्ठामीति प्रभुः प्रोक्त्वाष्टौ ग्रामानेकदाभ्यगात् ।।२३।।**
**स्थलेषूवास पञ्चाहमष्टस्वपि जगन्मयः । लौकिकैकस्वरूपेण ततोऽस्थात् सङ्गमे प्रभुः ।।२४।।**
**स्वाद्वन्नशाटीकन्त्राण-पादुकार्पणसेवनैः । सन्तोषितः स भगवान् भक्तैराप मुहुर्मठम् ।।२५।।**
**पुनः सर्वेऽपि ते प्राप्ताः कार्तिक्यां तु परस्परम् । ऊचुर्मे धाम्नि पञ्चाहं दीपाल्यां संस्थितो गुरुः ।।२६।।**
**तत्रत्या अपि तं प्राहुः पञ्चाहं क्वापि नो गतः । अत्रैव प्रभुरस्माभिर् दीपावल्युत्सवं व्यधात् ।।२७।।**

तत्रत्यैः, 'भवान् नः हित्वा क्व याति?' इति उदिते, '(अहं) तु अत्र तिष्ठामि' इति प्रभुः प्रोक्त्वा, अष्टौ ग्रामान् एकदा अभ्यगात्।२३। जगत्+मयः अष्टेसु अपि स्थलेषु पञ्च+अहं उवास। ततः लौकिक+एक+स्वरूपेण प्रभुः सङ्गमे अस्थात्।२४। स्वादु+अन्न+शाटी+कं+त्राण+पादुका+अर्पण+सेवनैः भक्तैः सन्तोषितः भगवान् मुहुः मठं आप।२५। पुनः ते सर्वे अपि कार्तिक्यां प्राप्ताः परस्परं ऊचुः, 'गुरुः दीपाल्यां पञ्च+अहं मे धाम्नि संस्थितः।'२६। तत्रत्या अपि तं प्राहुः, 'प्रभुः पञ्च+अहं क्व अपि नो गतः। अत्र एव अस्माभिः दीपावलि उत्सवं व्यधात्।'२७।

हा सर्व प्रकार पाहून गाणगापुरच्या भक्तांनी विचारले, 'देवा, आपण दिवाळीत आम्हाला सोडून कुठे जाता?' त्यांना श्रीगुरू म्हणाले, 'मी तर इथेच थांबणार आहे!' असे त्यांचे समाधान करून सद्गुरुनाथ एकाच वेळी आठ गावांना गेले.२३. विश्वात्मक श्रीगुरू आठ गावांत नुसतचे गेले नाहीत तर त्या सर्वच गावी पाच दिवसपर्यंत राहिले. शिवाय एका (मुख्य) लौकिक स्वरूपाने संगमावरही राहिले.२४. गावोगावच्या भक्तांनी त्यांना गोडधोड जेवणाने, छाटी, शिरस्त्राण, पादुका इत्यादि अर्पण करून आणि त्यांची भक्तिभावाने सेवा करून त्यांना प्रसन्न केले. श्रीगुरूही आपल्या त्या सर्व प्रेमळ भक्तांचे समाधान करून मठात परतले.२५. पुनः ते सगळे कार्तिकी पौर्णिमेला श्रीगुरूंच्या दर्शनाला आले असता एकमेकांना सांगू लागले, 'गुरुमहाराज दिवाळीचे पाचही दिवस आमच्याकडेच होते!'२६. त्यांचा परस्परांतला वाद ऐकून गाणगापूरचे लोक त्यांना म्हणाले, 'महाराज कुठेही गेले नाहीत. दिवाळी इथेच आमच्याबरोबरच साजरी केली!' २७.

**मृषा मृषेति चान्योन्यं तदा प्रलपतो विभुः । तान्प्राह तूष्णीं स्थेयं भोः सर्वत्राहं गतः खलु ।।२८।।**
**तदा ते चकिताः सर्वे तुष्टुवुर्नतकन्धराः । भगवंस्ते परं पारं महिम्नोऽजानतां हि नः ।।२९।।**
**कथं लौकिकवाचस्त्वं स्तोत्रपात्रो भविष्यसि । श्रुतवाचामपि ब्रह्मन् न गुहाशयसंस्थित ।।३०।।**

तदा 'मृषा, मृषा' इति च अन्यःअन्यं प्रलपतः तान् प्रभुः प्राह, 'भोः तूष्णीं स्थेयम्। अहं सर्वत्र गतः खलु!'२८। तदा ते सर्वे चकिताः नत+कंधराः तुष्टुवुः। 'भगवन् ते महिम्नः परं पारं नः अजानतां हि।'२९। 'लौकिक+वाचः त्वं कथं स्तोत्रपात्रः भविष्यसि? (हे) गुहाशय+संस्थित ब्रह्मन्, श्रुत+वाचां अपि (स्तोत्रपात्रः) न।'३०।

तेव्हा, एकमेकांना 'खोटे, खोटे' असा प्रलाप करणाऱ्या त्या भक्तांना श्रीगुरूंनी शांत व्हायला सांगितले आणि म्हणाले, 'मी खरोखर सर्वांच्याच घरी होतो!'२८. तेव्हा आश्चर्यचकित होऊन सर्वांनी माना तुकवून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'भगवंता, तुझ्या महिमेचा परपार आम्हाला कळणे शक्य नाही.'२९. आमच्या ह्या लौकिक वाचेने तर आम्ही स्तुती करू शकतच नाही, पण हे गहन अंतरात राहणाऱ्या कूटस्थ ब्रह्मा, वेदांच्या वाचेलाही ते शक्य नाही. ब्रह्माला तैत्तिरीय उपनिषदांत (२:१:१) खोल अंतरात निहित असे म्हटले आहे (*निहितो गुहायाम्*). गुहाशय म्हणजे बुद्धी. तिच्या ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या त्रिपुटीतून होणाऱ्या व्यवहारातच भ्रांतिद्वारा भोग व विवेकाने मोक्ष निगूढ आहेत. आत्मस्वरूपही (ब्रह्म) त्या बुद्धीच्या माध्यमांतूनच उपलब्ध होते. म्हणून **गुहाशयांत संस्थित** असे विशेषण इथे योजले आहे. कठोपनिषदातही (१:३:१२) 'हा आत्मा सर्व जीवमात्रांत गूढरूपाने वास करतो; पण तो केवळ सूक्ष्म दृष्टीच्या ऋषींनाच त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीने दिसतो' असे म्हटले आहे. केनोपनिषदातही 'जे वाचेने व्यक्त होत नाही, ज्याने वाचा अभिव्यक्त होते' असे ब्रह्माचे वर्णन केले आहे. त्यानेही वाणीने त्याचे स्तोत्र करता येत नाही याचीच पुष्टी होते.३०.

**विश्वव्यापक तेऽनन्त दिव्यं जन्म क्रियाप्यज । नान्यार्थं नोऽमृतत्वार्थमवतारप्रयोजनम् ।।३१।।**
**श्रूयते दृश्यतेऽदो यत् त्वन्मायेयं दुरत्यया । मा वृणोत्विविति भो श्रीमन् देहि नो दक्षिणां वराम् ।।३२।।**
**इत्युक्त्वा प्रणतिं चक्रुस्तान्सन्तोष्य जगत्प्रभुः । सर्वान्प्रस्थापयामास स्वं स्वं धामापि ते ययुः ।।३३।।**
**एवं स भगवान्नूनं पूर्णः सच्चित्सुखात्मकः । भक्ताधीनतया चेष्टा दुर्विभाव्या व्यधादिह।।३४।।**

(हे) विश्व+व्यापक, (हे) अनन्त, (हे) अज, ते दिव्यं जन्म, क्रिया अपि न अन्य+अर्थम्। तव अवतार+प्रयोजनं नः अमृत+अर्थम्।३१। (हे) श्रीमन्, अदः यत् श्रूयते, दृश्यते इयं दुः+अत्यया त्वत्+माया नः न आवृणोतु इति वरां दक्षिणां देहि।३२। इति उक्त्वा प्रणतिं चक्रुः। जगत्+प्रभुः तान् सर्वान् संतोष्य प्रस्थापयामास। ते अपि स्वं स्वं धामं ययुः।३३। एवं सः पूर्णः सत्+चित्+सुख+आत्मकः भगवान् नूनं इह भक्त+अधीन+तया दुः+विभाव्या चेष्टा व्यधात्।३४।

'विश्वाला व्यापून राहिलेल्या, अनंत, निर्विकार सद्गुरो, तुझे अवतार आणि तुझ्या लीला अलौकिक आहेत. तुझ्या अवताराचे प्रयोजनहि अन्य कांहीही नसून आम्हा भक्तांचा मोक्ष हेच आहे.३१. श्रीमंता, हे जे कांही दिसणारे, ऐकले जाणारे इंद्रियगोचर जगत् आहे ती सर्व तुझी दुरत्यय माया आहे. तिच्या आवरणापासून आम्हांला मुक्त ठेव.' या प्रार्थनेत हे अभिप्रेत आहे की जीव हा परमात्म्याचाच अंश असल्याने त्याला वास्तव असा बंध नाही. मायेच्या आवरणाचा आभासिक बंधच आहे. 'ह्या जगाचा न निरोध आहे न उत्पत्ती आहे; इथे ना कुणी ना बद्ध आहे ना साधक; न कुणी मुमुक्षू आहे न कुणी मुक्त. अशी ही परमार्थता आहे,' या विद्यारण्यस्वामींच्या पंचदशीतील (*न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुर्न वा मुक्त इत्येषा परमार्थता।।* ६:२३५।।) वचनाचा हाच अभिप्राय आहे. म्हणून 'मायेच्या आवरणापासून आम्हाला मुक्त ठेव,' हीच श्रेष्ठ दक्षिणा त्या ब्राह्मणांनी मागितली आहे. दक्षिणा हा ब्राह्मणांचा अधिकारच आहे.३२. अशी प्रार्थना करून त्यांनी प्रभूंना प्रणिपात केले. जगन्नाथ सद्गुरूंनी त्या सर्वांचे समाधान करून त्यांना निरोप दिला. मग ते सर्व आपापल्या घरी गेले.३३. तो सच्चिदानंदस्वरूप भगवंत भक्तांना वश होऊन अशा मानवी बुद्धीला अगम्य अशा लीला करीत गाणगापुरांत राहिला होता.३४.

**जात्याचारवयोरूप-विद्यार्थगुणपौरुषम् । नापेक्षते हि भगवान् श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ॥३५॥**
**शृणु चित्रं प्रवक्ष्यामि कश्चिच्छूद्रो गुरुप्रियः । दास्येनैवैहिकान् भोगान् भुक्त्वान्ते मुक्तिभागभूत् ॥३६॥**
**कृषीवलः स तु सदा स्वकर्मासक्त एव तम् । स्वक्षेत्रादामठं यांतं ननाम प्रत्यहं गुरुम् ॥३७॥**
**तद्गमागमसौख्यार्थं प्रत्यहं सङ्गमायनम् । अपास्य कण्टकाश्मादीन् सुगमं विशदं व्यधात् ॥३८॥**

भगवान् जाति+आचार+वयः+रूप+विद्या+अर्थ+गुण+पौरुषं न हि अपेक्षते। प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।३५। 'चित्रं प्रवक्ष्यामि। शृणु। कश्चित् गुरु+प्रियः शूद्रः दास्येन एव ऐहिकान् भोगान् भुक्त्वा अन्ते मुक्ति+भाक् अभूत्।३६। सः कृषीवलः सदा स्व+कर्म+असक्तः एव। स्व+क्षेत्रात् आमठं यान्तं तं गुरुं प्रति+अहं ननाम।३७। प्रति+अहं तत्+गम+आगम+सौख्य+अर्थं सङ्गम+अयनं कण्टक+अश्मादीन् अपास्य सुगमं विशदं व्यधात्।३८।

त्या परमात्म्याला भक्ताकडून ब्राह्मणादि जाती; श्रौत वा स्मार्त आचार; बाल, युवा, वृद्ध आदि वय; सुंदर रूप; भौतिक वा आध्यात्मिक विद्या; संपदा; शांती, दया, क्षमा आदि गुण; प्राण, इंद्रिये वा शरीर यांचे बल या कशाचीही अपेक्षा नव्हती. त्यांना अपेक्षा होती तर ती केवळ दृढ श्रद्धा आणि गाढ भक्ती यांची! इथे श्रीगुरूंना **प्रभू** हे विशेषण लावण्यामागचा हेतू श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत सांगितला आहे. भक्तांचे ईप्सित पुरविताना त्यांच्या प्रभुत्वामुळे त्यांना कोणीही अडवू शकत नाही. इथे त्यांनी ऋग्वेदाचा संदर्भ दिला आहे (८:८१:३).३५.

'असाच एक चमत्कार घडलेला तुला सांगतो, ऐक. श्रीगुरूंचा आवडता एक शूद्र भक्त होता.३६. तो शेतकरी आपले शेतीचे काम अनासक्त वृत्तीने करायचा. रोज मठाकडून येणाऱ्या श्रीगुरूंना तो साष्टांग नमस्कार घालायचा.३७. श्रीगुरूंना चालताना टोचू वा लागू नयेत म्हणून तो संगमाच्या वाटेवरील काटे, खडे इत्यादि बाजूला सारून तो रस्ता मऊ आणि रुंद करायचा.'३८.

**नत्वा पूर्ववदायान्तं मुदा तद्गतमानसः । कृषिं चकार तं दासं पृच्छति स्मैकदा गुरुः ।।३९।।**
**सदा मेऽग्रे कुतः शूद्र पतस्येतेन किं वद । साध्यं किं तेऽस्ति मनसि तदद्योद्घाटयाखिलम् ।।४०।।**

**।। शूद्र उवाच ।।**

**भजामि सुखकामस्त्वां क्षेत्रं ते कृपयाखिलम् । मनोज्ञं भाति तत्प्रेक्ष नोपेक्ष्यः पादजोऽप्यहम्।।४१।।**
**तदा सस्मितमीशोऽपि सर्वं क्षेत्रं विलोक्य तत् । आप्रादुर्भूतसस्यं तं प्राह द्राक् छिन्ध्यदोऽखिलम् ।।४२।।**

आयान्तं मुदा तत्+गत+मानसः पूर्ववत् नत्वा कृषिं चकार। तं दासं एकदा गुरुः एकदा पृच्छति स्म।३९। '(हे) शूद्र, सदा मे अग्रे कुतः पतसि? एतेन ते किं साध्यम्? ते मनसि किं अस्ति? तत् अखिलं अद्य उद्घाटय।'४०। शूद्र उवाच। त्वां सुख+कामः भजामि। ते कृपया अखिलं क्षेत्रं मनोज्ञं भाति। तत् प्रेक्ष। पादजः अपि अहं न उपेक्ष्यः।४१। तदा ईशः अपि सस्मितं तत् सर्वं आ+प्रादुर्भूत+सस्यं क्षेत्रं विलोक्य तं प्राह, 'अदः अखिलं द्राक् छिन्धि।'४२।

परत संगमाकडून श्रीगुरू आले की पहिल्यासारखाच दंडवत घालायचा आणि आपल्या शेतीच्या कामाला लागायचा. त्या दासाला एकदा श्रीगुरूंनी विचारले,(३९) 'काय रे शूद्रा! रोज का माझ्यासमोर आडवा पडतोस? तुला यातून काय साधायचे आहे? तुझ्या मनात तरी काय आहे? आज सगळे कांही मला सांग पाहू.'४०.

तो शेतकरी म्हणाला, 'सुखाच्या इच्छेने मी आपली भक्ती करतो. आपल्या कृपेने ही माझी शेती चांगली दिसतेय, तिच्यावर आपली कृपादृष्टी एकवार पडू द्या! शूद्र म्हणून माझी उपेक्षा करू नका.'४१. त्याच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरू परमेश्वरांनी ते नुकत्याच अंकुरलेल्या पिकाने हिरवे दिसणारे सर्व रान पाहिले; आणि त्याला म्हणाले, 'हे सर्व लगेच कापून टाक!४२.

**विश्वासो मेऽस्ति वाक्ये चेच्छिन्धि मे यावदागमः । इत्युक्त्वा संगमं गत्वा प्रभुः कर्माह्निकं व्यधात् ।।४३।।**
**गत्वा शूद्रोऽपि पत्ये तु प्राह निश्चित्य ते करम् । क्षेत्रं देहीति स प्राह नेदं साध्वद्य कर्षक ।।४४।।**
**शश्वत्प्रार्थ्य परुद्दत्त-द्विगुणं भागमङ्घ्रिजः । दातुं निश्चित्य जग्राह प्रमापत्रमतोऽपि सः ।।४५।।**
**आहूयाथार्थलुब्धान्स लोकान्यावच्छिनत्ति तत् । सापत्या क्षेत्रमेत्य द्राग् वारयामास तं वधूः ।।४६।।**

मे वाक्ये विश्वासः अस्ति चेत् यावत् मे आगमः छिन्धि।' इति उक्त्वा प्रभुः सङ्गमं गत्वा आह्निकं कर्म व्यधात्।४३। शूद्रः अपि पत्ये गत्वा तु प्राह, 'ते करं निश्चित्य क्षेत्रं देहि' इति। स प्राह, '(हे) कर्षक, अद्य इदं न साधु।'४४। अङ्घ्रिजः शश्वत् प्रार्थ्य परुत्+दत्त+द्वि+गुणं दातुं निश्चित्य प्रमा+पत्रं जग्राह। अतः सः अपि (प्रमा+पत्रं जग्राह)।४५। अथ अर्थ+लुब्धान् आहूय लोकान् आहूय यावत् छिनत्ति तत् वधूः सापत्या द्राक् क्षेत्रं एत्य तं वारयामास।४६।

माझ्या वचनावर तुझा विश्वास असेल तर मी संगमावरून परत येईतोवर सगळे कापून टाक!' एवढे बोलून श्रीनरसिंह प्रभू संगमावर जाऊन आपल्या आह्निकात मग्न झाले.४३. इकडे तो शूद्र मालकाकडे गेला आणि म्हणाला, 'मालक, तुमचा कर पक्का करून मला शेत कापायला द्या.' मालकाने त्याला सांगितले की 'आज कांही ते शेत कापण्यायोग्य नाही.' त्यावर त्या शेतकऱ्याने वारंवार हात जोडून प्रार्थना केली आणि शेवटी गतवर्षीच्या दुप्पट कर देण्याचे मान्य करून त्याच्याकडून करारपत्र घेतले. त्या मालकानेही तसेच पत्र शेतकऱ्याकडून घेतले.४५.

मग त्या शूद्र भक्ताने द्रव्यलोभी कामकऱ्यांना बोलावून कापणीला सुरुवात केली. (कारण ही अकाळी कापणी करायला दुसरे कुणी आले नाहीत.) इतक्यात त्याच्या पत्नीला हे वृत्त समजून ती मुलाबाळांसह धावतपळत तिथे आली आणि त्याला अडवू लागली.४६.

**निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके । चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत् ।।४७।।**
**स नोन्मत्तस्तु भरत-प्रन्हादकबिभीषणैः । मातापित्रग्रजास्त्यक्ता गुर्वर्थे का कथान्यतः ।।४८।।**
**सा गत्वेशं रुदत्यूचे मुण्डिवाक्यानुवर्त्यहो । क्षेत्रं छिनत्ति तेऽपक्कं प्रमत्तस्तं निवारय ।।४९।।**
**निवारणाय सोऽप्येकं दूतं प्रेरयदेत्य सः । तस्मै गम्भीरया वाचा स्वामिवाक्यं शशंस ह ।।५०।।**

'निधाः तोत्राणि, मा छिन्धि.' इति वदन्त्याः सः कैशिके पत्+धूलिं चूर्ण+प्रतिनिधि+कृत्य पुनः आच्छिनत्।४७। सः न उन्मत्तः। भरत+प्रन्हादक+बिभीषणैः तु माता+पितृ+अग्रजाः त्यक्ताः। गुरु+अर्थे अन्यतः का कथा?४८। सा रुदति ईशं गत्वा ऊचे, 'अहो, मुण्डि+वाक्य+अनुवर्ती प्रमत्तः ते अपक्कं क्षेत्रं छिनत्ति। तं निवारय।'४९। सः अपि निवारणाय एकं दूतं प्रेरयत्। सः एत्य तस्मै गम्भीरया वाचा स्वामि+वाक्यं शशंस ह।५०।

'विळे-कोयते खाली ठेवा! कापू नका!' असा ओरडा करणाऱ्या बायकोच्या केशांत पायधुळीचेच जणू चूर्ण घालीत तिला त्याने पिटाळून लावले. पायधुळीचे चूर्ण केसांत घातले याचा अर्थ तिच्या अंगावर धावून गेल्यावर ती पळत सुटली आणि तिच्या पायांनी उडालेली धूळ तिच्या केसांत गेली असा दिसतो.४७. बायकोच्या अंगावर असे धाऊन जायला तो काय वेडा झाला होता का? असे वाटू नये यासाठी म्हटले आहे. तो वेडा नव्हता. भगवद्भक्तांची निष्ठा ही अशीच असते. भरताने माता, प्रह्लादाने पिता आणि बिभीषणाने ज्येष्ठ भ्राता यांचा गुरूंसाठी म्हणजेच ईश्वरासाठी - तोच सर्वांचा गुरू आहे - त्याग केला. पत्नी इत्यादि अन्य नात्यांची गोष्ट काय वेगळी आहे का?४८. ती शेतकऱ्याची पत्नी रडत रडत मालकाकडे गेली आणि म्हणाली, 'अहो आमच्या धन्याला वेड लागलंय! त्या संन्याशाच्या सांगण्यावरून तुमचे शेत पिकायच्या आधीच कापायला निघालेत. तुम्ही तरी त्यांना आवरा!'४९. त्या मालकानेही एक निरोप्या शेतावर पाठविला. त्याने येऊन शूद्राला मालकाचा निरोप गंभीर वाणीने सांगितला.५०.

**तं प्राह शूद्रोऽपि पत्ये शंसारब्धोद्यमस्य तु । पारं यास्ये नो बिभेमि तत्प्रमालिपिरस्त्यसौ ।।५१।।**
**दूतोऽप्यागत्य पत्ये तु तत्स्माचष्टेऽब्रवीत् स ताम् । शूद्र्यन्यथा कथं वाक्यं कार्यं सोऽप्यर्थधान्यवान् ।।५२।।**
**तच्छ्रुत्वा सा रुदत्याप क्षेत्रसीमां सुतान्विता । तच्छूद्रोऽप्यखिलं छित्वा गुर्वागममचिन्तयत् ।।५३।।**
**कृत्वाप्याह्निकमागच्छन्छान्तं सर्वमवेक्ष्य तम् । प्रणतं प्राह किमिदं कृतं साहजिकोक्तितः ।।५४।।**
**यदन्येन हृदापीदृक् कर्तुं शक्यं न भुव्यदः । कर्माद्य दुष्करं निन्द्यं त्वया कृतमतःपरम् ।।५५।।**

शूद्रः अपि तं प्राह। पत्ये शंस, 'आरब्ध+उद्यमस्य तु पारं यास्ये! (अहं) न बिभेमि। असौ तत्+प्रमा+लिपि अस्ति।'५१। दूतः अपि आगत्य पत्ये तत् आचष्टे स्म। सः ताम् अब्रवीत्। '(हे) शूद्री, वाक्यं अन्यथा कथं कार्यम्? सः अपि अर्थ+धान्य+वान्।'५२। तत् श्रुत्वा रुदती सा सुत+अन्विता क्षेत्र+सीमां आप। तत् शूद्रः अपि अखिलं छित्वा गुरु+आगमं अचिन्तयत्।५३। आह्निकं कृत्वा आगच्छन् सर्वं शान्तं अवेक्ष्य प्रणतं तं प्राह, 'साहजिक+उक्तितः इदं किं कृतम्?'५४। 'भुवि यत् अन्येन हृदा अपि ईदृक् कर्तुं न शक्यं, अदः दुष्करं निन्द्यं कर्म अद्य त्वया कृतम्। अतः परं..'५५।

शूद्रानेही त्याला जवाब दिला. 'सांग मालकाला, आता हे सुरू केलेले काम मी तडीला नेणारच. मी कांही त्याला भीत नाही, हा पहा, त्याचा परवाना माझ्याकडे आहे.'५१. त्या निरोप्यानेही मालकाला जाऊन त्याचा जवाब सांगितला. तो त्या शेतकरणीला म्हणाला, 'बाई काय करणार? एकदा लिहून दिलेले पत्र परत कसे घेणार? आणि मला ठाऊक आहे मला कर देण्यासाठी त्याच्याकडे धान्यही आहे आणि पैसाही आहे.'५२. मग ती शूद्रस्त्री रडत रडतच मुलांसह शेताच्या बंधाऱ्याला आली. तोपर्यंत त्या शेतकऱ्याने सगळे शेत कापून टाकले होते आणि तो श्रीगुरू संगमावरून येण्याची वाट पहात होता.५३. श्रीगुरू आपले आह्निक करून संगमावरून आले आणि त्यांनी सगळ्या शेताची कापणी झालेली आणि सर्व सामसूम पाहिली आणि दंडवत घालीत असलेल्या शेतकऱ्याला म्हणाले, 'अरे, मी सहज बोलून गेलो; तर हे तू काय केलेस?'५५.

**कुतस्ते भविता वृत्तिर्दास्यसीशाय किं वद । अपक्वं हरितं सर्वं सस्यमेतद्वृथा गतम् ।।५६।।**
**स प्राहोक्तं कथमपि श्रुतवत्सद्गुरोर्वचः । तन्मेऽपि फलदं जन्म दत्तं येन स वृत्तिदः ।।५७।।**
**भक्तिश्चेदुक्तवद्भूयात्त इत्युक्त्वा ययौ गुरुः । सोऽप्याप स्वगृहं धीरो ध्यायन्हरिपदाम्बुजम् ।।५८।।**
**कालेनाल्पीयसा सूर्य इते मूलर्क्षमम्बुदः । ववर्ष च्छिन्नमपि तद्यावनालाद्यवर्धत ।।५९।।**
**प्रादुर्भूतानसंभाव्यानङ्कुरानभितोऽमितान् । दृष्ट्वा जल्हादिरे सर्वे शूद्र्यप्यत्यन्तहर्षिता ।।६०।।**

'(अतः परं) ते वृत्तिः कुतः भवति? ईशाय किं दास्यसि? वद। एतत् हरितं अपक्वं सस्यं सर्वं वृथा गतम्!'५६। सः प्राह, 'कथं अपि उक्तं सद्गुरोः वचं श्रुतवत्। तत् मे अपि फलदम्। येन जन्म दत्तं स वृत्तिदः!'५७। 'ते भक्तिः चेत् उक्त+वत् भूयात्।' इति उक्त्वा गुरुः ययौ। सः अपि धीरः हरि+पद+अम्बुजं ध्यायन् स्वगृहं आप।५८। अल्पेन कालेन सूर्यः मूल+ऋक्षं इते अम्बुदः ववर्ष। तत् छिन्नं अपि यावनालादि अवर्धत।५९। अभितः अमितान् असंभाव्यान् अङ्कुरान् प्रादुर्भूतान् दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे। शूद्री अपि अत्यन्त हर्षिता।६०।

'आतां तुझा निर्वाह कसा होईल? आणि मालकाला काय देणार? सांग बरे! छान उगवलेले हे हिरवे गार शेत सगळे नापीक वाया गेले!'५६. तो उत्तरला, 'सहज वा थट्टेने कसेही सद्गुरूंचे वचन हे वेदवाक्यासारखे आहे. मला तेसुद्धा उत्तम फलदायक ठरेल! निर्वाहाचे म्हणाल तर जो जन्म देतो तोच अन्नही देतो.' इथे श्रीस्वामिमहाराजांनी एक सुभाषित उद्धृत केले आहे. *यो मे गर्भगतस्यापि वृत्तीं कल्पितवान् विभुः। शेषवृत्तिविधानाय स वै सुप्तोऽथवा मृतः।।* ज्या भगवंताने गर्भात असतानाही माझ्या जीविकेची योजना केली तो उरलेल्या आयुष्याची सोय न करायला काय झोपलाय की मेलाय?५७. 'तुझी जर अशी भक्ती असेल तर तू म्हणशील तसेच होईल!' असे म्हणून श्रीगुरू मठाला गेले. तो धैर्यधर शूद्रही श्रीगुरूंच्या पदकमलांचे चिंतन करीत आपल्या घरी परतला.५८. कांही थोड्या काळाने सूर्य मूळ नक्षत्राला गेला असताना मेघ वर्षला. त्यायोगे छाटून टाकलेल्या त्या ज्वारी इत्यादि पीकांच्या धाटांना पुनः चारी बाजूनी अगणित असंभाव्य अंकुर फुटले. ते पाहून सर्वांना आनंद झाला. शूद्री तर हरखून गेली.६०.

**पत्युः पादौ सकारुण्यं गृहीत्वा गद्गदाक्षरा । बभाषे गुरुभक्तोऽसि मम मन्तून्क्षमस्व भोः ।।६१।।**
**तथेत्युक्त्वा तया शूद्रः प्रपूज्य क्षेत्रपं गुरुम् । यान्तं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतो वाक्यमब्रवीत् ।।६२।।**
**अङ्घ्री चिन्तामणिर्वाक्यं सुधास्पर्धि दयानिधे । ज्योतिर्मयो न वेत्त्यन्धो घूकोऽर्कमिव धाम ते ।।६३।।**
**दृष्टं समूढपुण्येन धाम ते दिव्यमद्भुतम् । कृतकृत्योऽस्म्यतो देव मां माधोक्षज विस्मर।।६४।।**

पत्युः पादौ स+कारुण्यं गृहीत्वा गद्गद+अक्षरा बभाषे, 'भोः गुरु+भक्तः असि। मम मन्तून् क्षमस्व।'६१। तथा इति उक्त्वा शूद्रः तया क्षेत्र+पं प्रपूज्य, यान्तं गुरुं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतः वाक्यं अब्रवीत्।६२। '(हे) दया+निधे, (ते) अङ्घ्री चिन्तामणिः, वाक्यं सुधा+स्पर्धि, धाम ज्योतिः+मयः घूकः अर्क इव अन्धः न वेत्ति।६३। (हे) देव, (मया अपि) समूढ+पुण्येन ते दिव्यं अद्भुतं धाम दृष्टम्। अतः कृतकृत्यः अस्मि। (हे) अधोक्षज, मां मा विस्मर।६४।

तिच्या डोळ्यांतून पाणी वाहू लागले. पतीचे पाय धरून भरलेल्या कंठाने ती म्हणाली, 'अहो, तुम्ही खरेच गुरुभक्त आहात. माझ्या अपराधांची क्षमा करा.'६१. 'बरं, बरं' असे तिला म्हणून तिच्याबरोबर शेताला जाऊन त्याने क्षेत्राचे रक्षण करणाऱ्या देवाची पूजा केली. इथे **क्षेत्रप** या शब्दावर श्लेष करून श्रीस्वामिमहाराजांनी क्षेत्रप म्हणजे *क्षेत्रज्ञ* अर्थात् आत्मा असा अर्थ करून त्याच्या अज्ञानाने अश्रद्धा, त्यामुळे पतिनिंदा, श्रीगुरूंचा धिक्कार अशी दुष्कर्मे तिच्याकडून झाली. पण आता त्या आत्म्याच्याच प्रसादाने लौकिक लाभ दिसल्याने त्या तमोगुणाविष्ट शूद्रस्त्रीला दुर्लभ शांती प्राप्त झाली ही त्या क्षेत्रज्ञाचीच कृपा नाही का? अशा त्या अंतःस्थ आत्मरूपाचा सत्कार केला. त्याच वेळी श्रीगुरु तिकडून जात होते. त्यांना ती पिकलेली शेती दाखवून त्या शेतकऱ्याने साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला,(६२) 'दयासागरा, तुझे पाय चिंतामणी आहेत, तुझे वचन अमृताहून गोड आहे आणि तुझे स्वरूप ज्योतिर्मय आहे; परंतु दिवाभीताला सूर्य दिसत नाही तसे तुझे स्वरूप अज्ञानी जीवांना दिसत नाही. ते आज मी पाहिले. मी कृतकृत्य झालो! अधोक्षजा तुला माझा विसर पडू देऊ नको.'६४.

**तमाह श्रीगुरुः शूद्र धन्योऽस्यवरवर्ण ते । परितुष्टोऽस्मि दास्येन नूनं सद्गतिभाग्भव ॥६५॥**
**दुराचारोऽपि यदि चेत् सेवते मामनन्यधीः । स तु साधुर्हि तस्मात्त्वं स्वाचारो भक्तिमान् मयि ॥६६॥**
**अतस्ते दत्तमेतत्तु निवसेत् त्वत्कुलेऽमले । अचला कमला दास्यं मदीयं चाप्यसंशयम् ॥६७॥**
**इत्युक्त्वागाद्गुरुः सोऽपि गत्वेशं प्राह निश्चितात् । अधिभागं प्रदास्ये ते यतो धान्यर्धिरद्भुता ॥६८॥**

श्रीगुरुः तं आह, '(हे) शूद्र, अवर+वर्ण धन्यः असि। ते दास्येन नूनं परितुष्टः अस्मि। सत्+गति+भाक् भव।'६५। 'दुः+आचारः अपि यदि मां अनन्य+धीः सेवते चेत् स तु साधुः। हि तस्मात् स्व+आचारः (सु+आचारः) मयि भक्ति+मान्।६६। अतः ते एतत् तु ते असंशयं दत्तं, अचला कमला, मदीयं दास्यं अपि।'६७। इति उक्त्वा गुरुः अगात्। सः ईशं गत्वा प्राह, 'यतः अदभुता धान्य+ऋद्धिः ते निश्चितात् अधि+भागं प्रदास्ये'।६८।

त्याला श्रीगुरू म्हणाले, 'शूद्रा, तूं वर्णाने जरी कनिष्ठ असलास तरी धन्य आहेस! तुझ्या दास्यभक्तीने मी खरोखर पूर्ण प्रसन्न झालो आहे! तुला सद्गती लाभेल.'६५. श्रीगुरूंच्या बोलण्यात गीतेच्या (९:३०) श्लोकाचाच अनुवाद दिसतो. 'अगदी दुराचरणी जर अनन्यभावाने मला भजत असेल तर साधूच मानावा! तू तर आपल्या स्वतः चा (जातीचा) आचार पाळणारा आहेस. (उत्तम आचार करणारा आहेस असाही अर्थ करता येतो.) शिवाय माझी भक्ती करणारा आहेस.६६. म्हणून तुला माझे हे निःसंशय देणे आहे, स्थिर लक्ष्मी (संपत्ती) आणि माझे दास्य!' स्थिर संपत्ती दिल्यावर कदाचित् त्याच्याकडून प्रमाद घडू शकतो. म्हणून त्याला सन्मार्गावर स्थिरावणारे आपले दास्यही त्याला दिले आहे. इथे त्याला आत्मज्ञानाचा उपदेश का केला नाही अशी शंका घेण्याचे कारण नाही. शूद्राला उपनयनाभावी वेदांचा अभ्यास करता येत नाही. कुणी म्हणेल की ब्रह्मसूत्रानुसार (*तदुपर्यपि बादरायणः संभवात्।* १:३:२६) उपनयन न करताही देवांना वैदिक ज्ञान होऊ शकते तर शूद्रांना का नाही? देवांच्या बाबतीत त्यांना पूर्वजन्मार्जित पुण्याईने स्वयंप्रतिभेनेच वेदांचे ज्ञान असते. वेदांचे अध्ययन करावेच लागत नाही.

**स प्राह नान्यथोक्तिर्मे प्रसादात्सद्गुरोस्त्वियम् । लब्धा धान्यर्धिरनयं न स्पृशाम्यर्पयोक्तवत् ।।६९।।**
**परिपक्वं तदा दृष्ट्वा सस्यं छित्वानयद् गृहम् । कामं शेषं जनेभ्योऽदादमितं धान्यमुत्तमम् ।।७०।।**

सः प्राह, 'मे उक्तिःअन्यथा न। इयं धान्य+ऋद्धिः तु सद्गुरोः प्रसादात् लब्धा। अनयं न स्पृशामि। उक्तवत् अर्पय।'६९। तदा सस्यं परिपक्वं दृष्ट्वा छित्वा कामं गृहं आनयत्। शेषं अमितं उत्तमं धान्यं जनेभ्यः अदात्।७०।

त्यामुळे उपनयनसंस्काराची आवश्यकता नाही. शूद्राला वेदांच्या श्रवणाचा वा उच्चारणाचा अधिकार नसल्याने ते अध्यात्मविद्येचे अधिकारी कसे होतील? छांदोग्य उपनिषदात (४:२:५) रैक्वाने जानश्रुतीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करताना त्याला 'शूद्र' म्हटले आहे ते रूढ अर्थाने नाही. आपल्या विद्याराहित्याने दुःखी होऊन (*शुचा*) गुरूकडे धावणारा (*दुद्राव*) तो शूद्र असा अर्थ आहे. जानश्रुति वस्तुतः क्षत्रियच होता. मग शूद्रांना मुक्ती कशी मिळेल? महाभारतात शांतिपर्वात (३२८:४९) सांगितल्याप्रमाणे त्यांना पुराणश्रवणाचा अधिकार आहे. त्या श्रवणादिकांपासून त्यांना ज्ञानाचा अधिकार प्राप्त होऊन जन्मांतरी मोक्षलाभ होईल. धर्मव्याध वगैरे हीनयातीतल्या ज्ञान्यांची उदाहरणे पुराणात आहेत. त्यांच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासामुळे त्या जातीतही ज्ञानोदय झाला आहे. म्हणून शेतकऱ्याला केलेले दास्यदान योग्यच आहे.६७. असे म्हणून श्रीगुरू पुढे गेले. तो शेतकरीही मालकाकडे जाऊन म्हणाला, 'शेतांत अद्भुतरीत्या अमाप धान्य पिकले आहे. मी तुम्हाला ठरल्याहून अधिक धान्य देतो.'६८. तो मालक म्हणाला, 'मी माझा शब्द फिरवणार नाही! ही धान्यसमृद्धी तुला गुरूंच्या प्रसादाने झाली आहे. अन्यायाच्या कमाईला मी शिवणार नाही. आपला जेवढा ठराव झाला होता, तेवढेच मला दे.'६९. मग ते पिकलेले धान्य त्याने यथेष्ट घरी आणूनही उरले. तेव्हा त्याने कितीतरी धान्य लोकांना वाटून टाकले.७०.

**बहवो लेभिरे धान्यं प्रकामं सोऽपि सद्गुरोः । कृपया परया भूत्वा श्रीमान्सेवेऽतिनीचवत् ।।७१।।**
**तत्रेदृश्यः प्रभोर्लीलाः कति वृत्तास्तु कृत्स्नशः । न ज्ञाताः कैरपि पुरं मन्ये धन्यतमं तु तत् ।।७२।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सत्तमाश्रितकाश्यादि-क्षेत्रेषु भुवि सत्स्वपि । प्रीत्योवास कुतस्तत्र भगवान् मे वदस्व तत् ।।७३।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**तत्र तीर्थान्यनेकानि देवा अप्यखिलाः खलु । जगन्निवास उद्वीक्ष्य तस्थौ ध्रुवमधोक्षजः ।।७४।।**

बहवः प्रकामं धान्यं लेभिरे। सः अपि सद्गुरोः परया कृपया श्रीमान् भूत्वा अति+नीच+वत् सेवे।७१। तत्र ईदृशाः प्रभोः लीलाः वृत्ताः। कृत्स्नशः कैः अपि न ज्ञाताः। तत् पुरं तु धन्यतमं मन्ये।७२। नामधारक उवाच। 'भुवि सत्+तम+आश्रित+काशी+आदि+क्षेत्रेषु भुवि सत्सु भगवान् कुतः तत्र प्रीत्या उवास? तत् मे वदस्व।'७३। सिद्ध उवाच। 'जगत्+निवास तत्र अनेकानि तीर्थानि, अखिलाः देवाः अपि उद्वीक्ष्य अधोक्षजः ध्रुवं तस्थौ।'७४।

'खूप लोक हवे तेवढे धान्य घेऊन गेले. तो शूद्रही सद्गुरूंच्या कृपेने धनवान झाला. तरीही त्याला आढ्यतेचा स्पर्शही झाला नाही. तो अत्यंत दीनपणे सद्गुरूंची सेवा करीत राहिला.७१. अशा ह्या प्रभूंच्या किती तरी लीला त्या गाणगापुरात झाल्या. त्या सगळ्याच कुणालाही ठाऊक नाही. खरोखर ते गाव धन्यतम आहे.' ७२. नामधारकाने प्रश्न केला. 'मोठमोठ्या संतांनी सेविलेली काशी आदि अनेक क्षेत्रे ह्या भूमीवर आहेत. मग भगवंतांनी अत्यंत प्रीतीपूर्वक गाणगापूरलाच का वास्तव्य केले? कृपया मला सांगा.'७३. सिद्ध उत्तरले, 'त्यांचा निवास सर्व जगांत असला तरी भगवान अधोक्षज तिथे अनेक तीर्थे आणि सर्व देवांचे वास्तव्य पाहूनच राहिले आहेत.'७४.

**मन्दधीभिस्तु तीर्थानि तिष्येऽज्ञातानि तान्यतः । गुरुः प्राहैकदा लोकं पावनानि प्रदर्शयन् ॥७५॥**
**काशीं जिगमिषो लोक सर्वतीर्थानि चात्र तु । दर्शयामीति तान्प्रोक्त्वा तीर्थान्याह स दर्शयन् ॥७६॥**
**संगमोऽयं प्रयागोऽष्टौ तीर्थान्यत्र तु षट्कुले । त्रिवेणीसङ्गमोऽयं तु पापघ्न्यमरजेष्टदा ॥७७॥**
**जीवनायेशदत्तेन्द्र-नीयमानसुधाघटात् । युद्धे जालन्धरहत-देवानाममृतं च्युतम् ॥७८॥**
**किञ्चिच्च्युतादपि महा-प्रवाहोऽत्रामरत्वदः । कालमृत्युभयाघघ्नी जातैषामरजा ततः ॥७९॥**
**मनोरथाख्यं तीर्थं तु कल्पद्रवश्वत्थसन्निधौ । सन्तोषतीर्थमग्रेऽत्र रुद्रो विश्वेश्वरः स्वयम् ॥८०॥**

तिष्ये मन्द+धीभिः तीर्थानि अज्ञातानि। तानि पावनानि प्रदर्शयन् गुरुः एकदा लोकं प्राह,।७५। '(हे) काशीं जिगमिषः लोकः, सर्व+तीर्थानि तु अत्र दर्शयामि' इति तान् प्रोक्त्वा तीर्थानि दर्शयन् सः आह।७६। अय सङ्गमः प्रयागः। अत्र तु षट्कूले अष्टौ तीर्थानि। अयं तु त्रिवेणी+सङ्गमः। अमरजा पाप+घ्नी, इष्ट+दा (च)।७७। युद्धे जालंधर+हत देवानां जीवनाय ईश+दत्त+इन्द्र+नीयमान+सुधा+घटात् अमृतं च्युतम्।७८। किञ्चित् च्युतात् अपि अत्र अमरत्व+दः महाप्रवाहः। ततः एषा काल+मृत्यु+भय+अघ+घ्नी अमरजा जाता।७९। कल्पद्रु+अश्वत्थ+सन्निधौ तु मनोरथ+आख्यं तीर्थम्। अग्रे सन्तोष+तीर्थं अत्र रुद्रः स्वयं विश्वेश्वरः।८०।

कलियुगातील मंदबुद्धीच्या जीवांना मात्र ही तीर्थे अज्ञात असल्याने ती पावन तीर्थे प्रकट करण्यासाठी श्रीगुरू एकदा लोकांना म्हणाले,(७५) 'काशीयात्रेला जाऊ इच्छिणाऱ्या लोक हो, सर्वच तीर्थे मी तुम्हाला इथेच, गाणगापुरातच दाखवतो,' असे म्हणून ते सांगू लागले.७६. हा भीमा आणि अमरजा यांचा संगमच प्रयाग आहे. इथे षट्कूलात आठ तीर्थे आहेत. हा त्रिवेणीसंगमच आहे. ही अमरजा वांछित देणारी आणि पाप नासणारी आहे.७७. देव आणि दैत्यांच्या युद्धांत जालंधर नांवाच्या दैत्याकडून देवांचा मोठा संहार होऊ लागला. त्यावेळी त्यांना जिवंत करण्यासाठी भगवान शिवांनी दिलेला अमृताचा घडा इंद्र घेऊन जात असाताना त्यातील किंचित्से अमृत भूमीवर पडले.७८. त्या अमृतापासून हा अमरत्व देणारा महाप्रवाह निघाला. त्यापासूनच ही कालमृत्यू, भय आणि पाप यांना वारणारी अमरजा उगम पावली.७९. पुढे कल्पवृक्षसमान ह्या अश्वत्थाजवळ मनोरथ तीर्थ आहे. इथला हा रुद्र साक्षात् विश्वेश्वरच जाणा.८०.

**वामहस्तेन नन्द्यण्डं धृत्वाङ्गुष्ठं च तर्जनीम् । संस्थाप्य शृङ्ग्योर्मध्यात् कृतशैवीप्रदक्षिणः ।।८१।।**
**पश्येद्यदीशं मर्त्योऽपि देववच्छ्रीष्टयुग्भवेत् । साक्षात्काशीयमीशेन विहिता भक्ततुष्टये ।।८२।।**
**जीवन्मुक्तोऽत्र शैवः प्राग्लोके जड इतीरितः । येनाहिवज्जनो भोगा विषं स्त्रीः शववन्मताः ।।८३।।**

कृत+शैवी+प्रदक्षिणः वाम+हस्तेन नन्दी+अण्डं धृत्वा शृङ्ग्योः मध्यात् अङ्गुष्ठं च तर्जनीं संस्थाप्य,।८१। मर्त्यः अपि यदि ईशं पश्येत् देववत् श्री+इष्ट+युक् भवेत्। ईशेन भक्त+तुष्टये विहिता इयं साक्षात् काशी।८२। प्राक् अत्र जीवन्+मुक्तः शैवः लोके जड इति ईरितः। येन जनः अहि+वत्, भोगाः विषं, स्त्रीः शव+वत् मताः।८३।

या शंकराला शैवा प्रदक्षिणा करून, डाव्या हाताने नंदीचे वृषण धरून व शिंगांवर अंगठा आणि तर्जनी ठेवून(८१) शंकराचे जो दर्शन घेईल तो मर्त्य मानवसुद्धा देवासारखा धन आणि स्त्री, अन्न, पान इत्यादि इष्ट भोगांनी युक्त होतो. ही भगवान शंकरांनी भक्ताच्या तोषासाठी स्थापन केलेली साक्षात् काशीच आहे.८२. पूर्वी इथे एक शंकराचा जीवन्मुक्त, सदैव निरतिशय आनंदांत निमग्न झालेला भक्त रहात होता. लोक त्याला वेडा म्हणत. त्याने लोक सापासारखे मानून त्यांचा संग टाकला होता. कारण लोकरूपी सापाच्या दंशाने दुर्वासनांचे विष मनात भिनून विषयबाधा होते आणि कामादिवेदनांनी कष्टत तो साधू, प्रमाद नावाच्या मृत्यूला बळी पडतो. भोगांना तो विषच मानी. भोग काय किंवा विष काय शरीरात भिनून मृत्यूला कारण होतात. विषयतादात्म्याने प्रमाद - स्वरूपाचे विस्मरण होणे हे मरणच आहे. स्त्री त्याला प्रेतासारखी वाटते. दिवसा गिधाडे जशी प्रेतावर उड्या टाकून त्याचे लचके तोडतात आणि लांडगे-कोल्हे एकांतात रमतात, तसेच ह्या स्त्रीरूप प्रेताशी विषयासक्त लोकांचे वर्तन असते. म्हणून स्त्री दृष्टीला पडली तरी स्नान करावे असे त्या शिवभक्ताचे मत होते.८३.

**कदाचित्स सदा युक्तः प्रमाथीन्द्रियसंयमी । बन्धूनाहात्र काशीयं त ऊचुर्दर्शयाद्य नः ।।८४।।**
**स दध्यावीशमीशोऽपि तदैत्याहेप्सितं वद । स प्राहाद्य त्वया सार्धं काशीं संस्थापय ध्रुवाम् ।।८५।।**
**तथेत्युक्त्वेश्वरोऽगात्तज् जलान्तः कुण्डमुत्तमम् । उद्भूतं तत्र विश्वेश-मूर्तिराविरभूत्क्षणात् ।।८६।।**
**काश्यां चिह्नानि यान्यत्र जातान्यालोक्य तानि सः । स्वजनान्दर्शयित्वोचे काशीयं क्वापि यात नो ।।८७।।**

सदा युक्तः प्रमाथी+इन्द्रिय+संयमी सः कदाचित् बन्धून् आह, 'अत्र इयं काशी।' ते ऊचुः, 'अद्य नः दर्शय!'८४। सः ईशं दध्यौ। ईशः तदा एत्य आह, 'ईप्सितं वद।' सः प्राह, 'अद्य त्वया सार्धं ध्रुवां काशीं संस्थापय।'८५। ईश्वरः 'तथा' उक्त्वा अगात्। तत् जल+अन्तः उत्तमं कुण्डं उद्भूतम्। तत्र क्षणात् विश्वेश+मूर्तिः आविरभूत्।८६। यानि काश्यां चिह्नानि तानि अत्र जातानि आलोक्य सः स्व+जनान् दर्शयित्वा ऊचे, 'इयं काशी। क्व अपि नो यात।'८७।

निरंतर आत्मस्वरूपाशी युक्त असलेला आणि बलिष्ठ इंद्रियांवरही ताबा असलेला तो पिसा एकदा आपल्या बांधवांना म्हणाला, 'इथे ही काशीच आहे!' ते म्हणाले, 'तर मग आज आम्हाला दाखव पाहू!'८४. शिवप्रभूंचे स्मरण केले. लगेच प्रकट होऊन ते म्हणाले, 'तुला काय हवे ते सांग.' तो म्हणाला, 'आज या ठिकाणी चिरंतन काशीची स्थापना करा.'८५.

शंकर परमात्मा 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. त्याच वेळी पाण्यातून एक उत्तम कुंड उद्भवले आणि तिथे क्षणांत विश्वेश्वराची मूर्ती प्रकट झाली.८६. काशीत जी जी चिह्ने आहेत ती सर्व इथे दिसू लागली. ती पाहून त्या शिवभक्ताने आपल्या बंधूंना दाखविली आणि म्हणाला, 'ही काशी! आता तुम्हाला कुठेही जायला नको.'८७.

**प्रत्यब्दं पूजयित्वा नो विठ्ठलं कुलदैवतम् । काशीयात्रात्र कर्तव्या सर्वाघघ्नीप्सितार्थदा ।।८८।।**
**तस्मात्काशीयमित्यस्मिन् गुरौ ब्रुवति तत्क्षणम् । पूर्वाश्रमस्वसा रत्ना-नाम्नी प्राप्य ननाम तम् ।।८९।।**
**तामाह श्रीगुरुः प्रोक्त-स्मृतिस्तेऽस्ति न वा वद । सापि स्मृत्वा तदा स्वाङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह ।।९०।।**
**तां खिन्नां प्रणतां प्राह प्रभुः पापं भवान्तरे । चेद्भोक्ष्यसेऽत्र कुष्ठं द्रागपैत्यंहः प्रयत्नतः ।।९१।।**
**सा प्राह मातृकुक्षौ मे यथेतो न भवेत्स्थितिः । तथैव भवता कार्यं नान्यज्जाने परात्पर ।।९२।।**

'प्रति अब्दं कुल+दैवतं विठ्ठलं पूजयित्वा अत्र सर्व+अघ+घ्नी इप्सित+अर्थ+दा काशी+यात्रा कर्तव्या।'८८। 'तस्मात् इयं काशी' इति अस्मिन् गुरौ ब्रुवति तत्+क्षणम् पूर्व+आश्रम+स्वसा रत्ना+नाम्नी प्राप्य तं ननाम।८९। श्रीगुरुः तां आह। 'ते प्रोक्त+स्मृतिः अस्ति वा न? वद।' सा अपि स्मृत्वा तदा स्व+अङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह।९०। तां खिन्नां प्रणतां प्रभुः प्राह, 'पापं भव+अन्तरे भोक्ष्यसे चेत् कुष्ठं द्राक् अपैति, अंहः प्रयत्नतः (अपैति)।'९१। सा प्राह, 'यथा इतः मे मातृ+कुक्षौ स्थितिः न भवेत् तथा एव भवता कार्यम्। (हे) परात्पर अन्यत् न जाने।'९२।

'दर वर्षी आपल्या कुलदैवताची - विठ्ठलाची पूजा करून पापहारी आणि ईप्सितदायी काशीयात्रा इथे विधिवत् करावी.'८८. 'तेव्हापासून ही काशी झाली,' असे श्रीगुरू बोलतात न बोलतात तोच त्याच क्षणी त्यांची पूर्वाश्रमातील भगिनी रत्नाबाई तिथे आली आणि तिने श्रीगुरूंना नमस्कार केला.८९. श्रीगुरूंनी तिला विचारले, 'मी काय सांगितले ते आठवते ना?' तिला श्रीगुरूंनी, 'तुझा पती संन्यास घेईल आणि शरीरावर कुष्ठ पसरेल' असे सांगितले ते आठवले आणि लगेच तिला आपल्या सर्वांगावर कोड फुटलेले दिसले.९०. तेव्हा रत्नाबाईंनी दुःखित होऊन त्यांना नमस्कार केला. श्रीगुरू तिला म्हणाले, 'हे पाप जर तू पुढच्या जन्मी भोगायला तयार असशील तर कुष्ठ लगेच दूर होऊ शकेल. पापाचा परिहार होण्यासाठी प्रयत्न करावा लागेल.'९१. ती म्हणाली, 'परात्पर सद्गुरो, यापुढे मला पुनः आईच्या गर्भात राहण्याची वेळ येऊ नये असेच आपण करा. मी याउपर कांही जाणत नाही!'९२.

**गुरुः प्राहाघहृत्तीर्थे त्र्यहं स्नानाच्छिवान्तिके । सप्तजन्मार्जितांहोऽपि नश्येत्कुष्ठस्य का कथा ॥९३॥**
**सापि तत्र त्र्यहस्नानाद् भूत्वा कुष्ठोनितामला । मठं निर्माय तत्रैव स्थिता मुक्ता बभूव ह ॥९४॥**
**गुरुस्त्वग्रेऽघहृज्जम्बु-द्वीपस्थाखिलतीर्थवत् । कोटितीर्थं दर्शयित्वा प्राहेदं सफलाघहृत् ॥९५॥**
**क्रान्तिपर्वग्रहेष्वत्र स्नानदानजपादयः । अक्षय्यानन्तफलदा अकुत्सितहृदां नृणाम् ॥९६॥**
**गयावद्रुद्रपादाख्यं तीर्थं त्वग्रे गयोक्तवत् । कृध्वं कर्मात्र कृष्णाग्रे चक्राख्यं द्वार्वतीसमम् ॥९७॥**

गुरुः प्राह, 'शिव+अन्तिके अघ+हृत् तीर्थे त्रि+अहं स्नानात् सप्त+जन्म+अर्जित+अंहः अपि नश्येत्। कुष्ठस्य का कथा?'९३। सा अपि तत्र त्रि+अह+स्नानात् अमला कुष्ठ+ऊनिता भूत्वा मठं निर्माय तत्र एव स्थिता मुक्ता बभूव ह।९४। गुरुः तु अग्रे जम्बु+द्वीप+स्थ+अखिल+तीर्थ+वत् अघ+हृत् कोटि+तीर्थं दर्शयित्वा प्राह, 'इदं सकल+अघ+हृत्।'९५। अत्र क्रान्ति+पर्व+ग्रहेषु स्नान+दान+जप+आदयः अकुत्सित+हृदा नृणां अक्षय्य+अनन्त+फलदाः।९६। अग्रे तु गयावत रुद्र+पाद+आख्यं तीर्थम्। अत्र कर्म कृध्वम्। (तथा) अत्र कृष्ण+अग्रे चक्र+आख्यं द्वार्वतीसमं (तीर्थम्)।९७।

गुरू त्यावर म्हणाले, 'इथे शिवमंदिराजवळ पापनाशी तीर्थ आहे. त्यात तीन दिवस स्नान केल्यावर सात जन्मांचेही पाप नष्ट होते. मग कुष्ठाची काय कथा?'९३. रत्नाबाईने त्याप्रमाणे पापनाशन तीर्थात तीन दिवस स्नान केले. श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे तिचे कुष्ठ पूर्ण मावळले आणि ती शुद्ध झाली. पुढे तिने तिथेच एक मठी बांधली आणि तिथेच राहून अंती मुक्त झाली.९४. श्रीगुरू तिथून पुढे निघाले आणि सर्व लोकांना जम्बुद्वीपातील (भूलोकातील सात द्वीपांतील प्रमुख जम्बुद्वीप आहे. त्यातील मध्यवर्ती भारतवर्ष आणि त्याच्या मधोमध गाणगापूर आहे.) सर्व तीर्थांसमान पापहारी असे कोटितीर्थ दाखविले आणि म्हणाले, 'हे सर्व पापांचा नाश करणारे तीर्थ आहे.'९५. इथे मेषादि संक्रांतीला, पौर्णिमा-अमावस्या-व्यतिपातादि पर्वणींना आणि सूर्य-चंद्रग्रहणात स्नान, दान, जप इत्यादि केल्यास निष्कपट आणि श्रद्धावान भक्तांना अक्षय आणि अनंत फळ मिळते.९६. याच्या पुढे रुद्रपाद नावाचे गयेसारखेच तीर्थ आहे. इथे गयेला जसे सांगितले आहे तसे कर्म करावे. पुढे श्रीकृष्णासमोर चक्र नावाचे तीर्थ आहे. ते द्वारकेसारखे आहे.९७.

**द्वारकोक्तवदाचीर्णात् फलं तस्याश्चतुर्गुणम् । स्नानाज्ज्ञानी भवत्यत्र पतितोऽप्यस्थिचक्रवत् ।।९८।।**
**गोकर्णवद्ग्रामपूर्व-भागः कल्लेश्वरोऽत्र तु । महाबलेशवत्तीर्थं मन्मथाख्यं सुसिद्धिदम् ।।९९।।**
**नभस्यखण्डाभिषेकादूर्जे दीपोत्सवात्स तु । अक्षय्यफलदो दद्यात् सर्वसिद्धियुतामृतम् ।।१००।।**
**एवं शशंसाखिलतीर्थयात्रां । तेऽपि प्रहृष्टाश्च तथैव चेरुः ।**
**एतादृशं क्षेत्रमिदं वरीयो विज्ञाय विज्ञानमयात्मकोऽस्थात् ।।१०१।।**

(अत्र) द्वारका+उक्त+वत्+आचीर्णात् तस्याः चतुः+गुणं फलम्। अत्र स्नानात् पतितः अपि ज्ञानी भवति। अस्थि चक्रवत् च (भवति)।९८। ग्राम+पूर्व+भागः कल्लेश्वरः। अत्र तु महाबलेशवत् मन्मथ+आख्यं सुसिद्धि+दं तीर्थम्।९९। नभसि अखण्ड+अभिषेकात्, ऊर्जे दीप+उत्सवात् तु अक्षय्य+फलदः सर्व+सिद्धि+युत+अमृतं दद्यात्।१००। एवं अखिल+तीर्थ+यात्रां शशंस। ते अपि प्रहृष्टाः तथा एव चेरुः। इदं एतादृशं क्षेत्रं वरीयः विज्ञाय विज्ञान+मय+आत्मकः अस्थात्।१०१।

द्वारकेला सांगितलेला आचार इथे केल्यास द्वारकेच्या चौपट फळ मिळते. इथे स्नान केल्याने पतितही ज्ञानी होतो आणि त्याच्या अस्थी चक्रांकित होतात.९८. गाणगापूरच्या पूर्वभागात कल्लेश्वराचे मंदिर आहे. इथे गोकर्ण महाबळेश्वरासारखे सिद्धिप्रद मन्मथ तीर्थ आहे. इथे श्रावण महिन्यात शंकराला अखंड अभिषेक केल्याने तसेच कार्तिक महिन्यात दीपोत्सव केल्याने सर्व सिद्धी आणि मोक्ष लाभतात.

अशी ही परिपूर्ण तीर्थयात्रा श्रीगुरूंनी त्या लोकांना सांगितली. त्यांनीही आनंदभराने तसेच आचरण केले. असे हे क्षेत्र महान् आहे हे जाणून समस्तज्ञानस्वरूप श्रीगुरू तिथे राहिले.१०१. (पुढच्या अध्यायात) म्लेच्छाचा उद्धार करून भाविकांसाठी कामधेनूच असलेले श्रीगुरू तिथेच राहिलेले आहेत. साक्षात् परमेश्वर असूनही अज्ञानाच्या अंधाराने आंधळ्या झालेल्या जनांना ते दिसत नाही, जसा जन्मांधाला सूर्य दिसत नाही.

**म्लेच्छं समुद्धृत्य ततोऽखिलात्मा तत्र स्थितो भाविककामधेनुः ।**
**प्रत्यक्ष ईशोऽपि न दृश्यतेऽसाववित्तमोऽन्धैररुणो यथान्धैः ।।१०२।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे क्षेत्रमाहात्म्यवर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः द्वाविंशोऽध्यायः ।।**

ततः म्लेच्छं समुद्धृत्य अखिल+आत्मा भाविक+कामधेनुः तत्र स्थितः। असौ प्रत्यक्ष ईशः अपि अवित्+तमः+अन्धैः न दृश्यते, यथा अन्धैः अरुणः।१०२।

मागील श्लोकांत सांगितलेले अमृतत्व (मोक्ष) सापेक्ष (relative) समजावे. कारण ते पुण्याने उत्पन्न होते म्हणजे ते गृहादिकांसारखे नाशिवंतच होय. 'प्रलयानंतरही जे राहते त्या स्थानाला अमृतत्व म्हणतात,' *(आभूतसंप्लवं स्थानममृतत्वविमिति भाष्यते)* या विष्णुपुराणाच्या (२:८:९६) व्याख्येनुसार हे आत्यंतिक (absolute) अमृतत्व ठरत नाही. आत्यंतिक अमृतत्व आत्मसाक्षात्कार. ते पुरोडाशाप्रमाणे उत्पाद्य नाही, सोमासारखे विकार्य नाही, मंत्रासारखे प्राप्य (सिद्ध करणे) नाही किंवा साळीसारखे संस्कार्य नाही. 'जीवमात्रांमध्ये स्थित असलेला एकच आत्मा आहे.' *(एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः।)* या ब्रह्मबिंदूपनिषदाच्या(१२) वचनानुसार आत्मा एकमेव, सम आणि अविनाशी आहे. 'सर्वच भूतांमध्ये सारखाच अवस्थित असलेला आत्मा' असे गीतेचेही(१३:२७) वचन आहे. अशा आत्म्याला कसली आशा वा अपेक्षा असूंच शकत नाही. केवळ मिथ्या ज्ञानानेच त्याला अशा आशा-अपेक्षा होऊं शकतात. आकाशाप्रमाणे निष्क्रिय, दुःखाचा संसर्गही नसलेल्या परमानंदस्वरूप आत्म्याला, 'मला दुःख होऊं नये, मला सुख व्हावे,' अशी इच्छा किंवा 'माझे शरीर बलशाली आहे, मी समर्थ आहे' असा अभिमान मिथ्याज्ञानाविना संभवतच नाही. मिथ्याज्ञान असलेल्या आत्म्यालाच, 'मला पत्नी असावी म्हणजे मला संतति होईल, मला संपत्ती मिळावी म्हणजे मी कर्मे करीन' (बृहदारण्यक उपनिषद १:४:१७) असे वाटते. कारण तो स्वतःला यांच्यावांचून अपूर्ण मानतो. जेव्हां

त्याच्या जायादि कोणत्याच बाह्य इच्छा पूर्ण होत नाहीत तेव्हां तीच श्रुति त्याला त्याचे 'मन हाच आत्मा, वाचा हीच जाया, प्राण हीच संतति' इत्यादि संपत्तींचा निर्देश करते. हे अज्ञानाचेच लक्षण आहे. कारण मन इत्यादींविषयी आत्मत्वादि अभिमान अज्ञानांतूनच उगम पावतो. जसा बाह्यकामिनी न मिळालेला पुरुष झोंपेत मनानेच कल्पिलेल्या कामिनीचा उपभोग घेतो तसा स्वर्गादींची इच्छा करणारा यज्ञांचे अनुष्ठान करून स्वप्नतुल्य अशा सातिशय पण अनित्य अशा स्वर्गसुखांत निमग्न होतो. त्याला स्वर्गलोकांतून परत भूलोकांत यावेच लागते. मुंडकोपनिषदांत (१:२:९-१०) सांगितल्याप्रमाणे, 'आसक्तीने कर्म करणाऱ्या लोकांना सत्याचे ज्ञान नसल्याने, त्यांनी कर्मांनी प्राप्त केलेल्या लोकांपासून (त्या कर्माचे फळ संपल्यावर) ढळतात आणि खालच्या लोकांत पडतात. त्या विमूढांना इष्ट आणि पूर्त हेच श्रेष्ठ वाटतात. दुसरे कांही श्रेयस्कर कर्म ते जाणतच नाहीत. आपल्या कर्मांनी कमावलेल्या स्वर्गलोकातील सुखांचा भोग घेऊन ते परत ह्या भूलोकांत येतात किंवा आणखी खालीही जाऊं शकतात.' भगवद्गीतेतही (९:२१) *'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलाकं विशन्ति। '* असे म्हटले आहे.

याप्रमाणे मुमुक्षु जर मंदप्रज्ञ असेल तर त्याला श्रुति स्वर्गसाधनभूत यज्ञांचा उपदेश करते. तो मुमुक्षु जर ज्ञानी असेल तर श्रुति त्याला अध्यात्मयज्ञाच्या अनुष्ठानाचा उपदेश करते. त्याचप्रमाणे काशीला जाण्याला अशक्त असणाऱ्या पण आत्मशुद्धीची इच्छा असणाऱ्यांना त्यांच्या निकटच असलेल्या सर्व तीर्थ आणि देवतांनी युक्त अशा स्थानाला 'हीच काशी' असे सांगून त्या गाणगापूरचे काशीशी असलेले साम्य प्रकट केले. हा झाला वरील तीर्थनिरूपणाचा बाह्य अर्थ.

**तीर्थनिरूपणाचा आंतरिक अर्थ -** कलियुगांतील मंदबुद्धीच्या मानवांना देहांतच विद्यमान असलेल्या संसारांतून तरण्याचे ध्यानादि उपाय (तीर्थे) ठाऊक नाहीत. म्हणून त्यांना जाणवून देण्यासाठी श्रीगुरु त्यांना म्हणाले. ७५. काशी म्हणजे प्रकाशणारे, तेजस्वी म्हणजेच ज्ञान असा अर्थ घेऊन, काशीला जाऊं इच्छिणाऱ्या म्हणजे ज्ञानाची जिज्ञासा,

मुमुक्षा असणाऱ्या लोकांना उद्देशून ते म्हणातात. 'सर्व तीर्थे (ज्ञानाची साधने) इथे ह्या गंधर्वनगरांत - म्हणजेच दृष्टनष्टस्वरूप देहांतच आहेत.' ७६. इडा, पिंगला आणि सुषुम्णा (*इडा भगवती गङ्गा पिंगला यमुना नदी। तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती।।* पद्मपुराण) ह्यांचा संगमभूत हे आज्ञा चक्र हेच प्रयाग आहे. सात्त्विकभावरूपी अष्ट तीर्थे इथे आहेत. सुषुम्णा मार्गावरील मूलाधारादि सहा चक्रे हीच ह्या संगमाचे सहा कांठ आहेत. ही सुषुम्णाच क्रममुक्तीरूप इष्टफल देणारी अमरजा नदी होय. कठोपनिषदांत (२:३:१६) सांगितल्याप्रमाणे 'हृदयांतून जाणाऱ्या शंभर नाड्यांपैकी मस्तकांतून बाहेर पडणारी हीच एक नाडी आहे. तिच्यांतून वर जाणाराच अमृतत्व पावतो.' किंवा त्रिवेणीसंगम म्हणजे 'तत्', 'त्वं' आणि 'असि' ह्या तीन पदांचा योग असणारे महावाक्य असाही अर्थ करतां येतो.७७.जालंधरासुर मनाच्या स्वाभाविक वृत्ती (instincts) आणि त्यांच्या विरुद्ध प्रकाशरूप देव यांच्यांतल्या छांदोग्य उपनिषदांत (१:२:१) वर्णन केलेल्या युद्धांत, *'इंद्रायेन्द्रो परिस्रव'* (ऋग्वेद ८:९१:३) वचनानुसार ईश म्हणजे आत्म्याने, इन्द्र म्हणजे जीवाला दिलेले म्हणजे सहस्रार चक्रांतून स्रवणारे अमृत जाणावे. ७८. स्वरूपाचे विस्मरण (प्रमाद) हाच कालमृत्यु; ज्याच्यामुळे भय होते ते द्वैत हेच **भय** शब्दाने सूचित केले आहे. **अघ** म्हणजे आत्म्याच्या हत्येचे पाप. निर्दोष माणसावर मिथ्यारोप करणे हा त्याची शस्त्रावांचून केलेली हत्याच ठरते. तद्वत् नित्य, शुद्ध बुद्ध आत्मस्वरूपावर पापित्वादि आरोप (अध्यास) ही त्याची हिंसाच होय. *'असुर्या नाम ते लोका'* या ईशावास्योपनिषदाच्या मंत्रावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी असे म्हटले आहे कीं, 'अविद्येच्या दोषाने विद्यमान आत्म्याचा तिरस्कार केल्याने विद्यमान आत्म्याची अजर, अमर इत्यादि लक्षणे जाणीवेतून जातात. एखाद्याला ठार केल्यावर त्याचा प्रभाव नाहीसा होतो तसेच हे आहे. यासाठीच प्राकृत अज्ञानी जीवांकडून आत्म्याच्या हत्येचे पाप घडते.' महाभारतांतही *'किं तेन न कृतं पापं चोरणात्मापहारिणा।'* असे म्हटले आहे. ७९. मनोरथ तीर्थ म्हणजे भक्ति. संतोष हेच संतोषतीर्थ. *रुतं* म्हणजे शोक त्याला *द्रावयति* म्हणजेच पळवतो तो **रुद्र** अर्थात् सात्त्विक अहंकार. नेहमी त्याच्याबरोबरच राहणारा आणि आनंददायी विवेक म्हणजेच **नंदी**.

८०. **शैवी प्रदक्षिणा** याचा अर्थ श्रवण, मनन, निदिध्यासन यांची वरचेवर केलेली आवृत्ती. ८१. **ईश** म्हणजे आत्मा त्याचे दर्शन म्हणजे ' तोच मी आहे' अशी अपरोक्ष अनुभूति. तिच्यामुळे होणारी इष्टप्राप्ती आणि अनिष्टनिवृत्ती वर सांगितलीच आहे. ८२. पुढे ९३ व्या श्लोकापर्यंत सांगितलेला इतिहास विश्वास निर्माण व्हावा यासाठी सांगितला आहे. रत्नाबाईचे कुष्ठ हे जन्ममरणरूपी संसाराचेच रूपक आहे. तिला तीन दिवस स्नान करायला सागितले ज्ञानाभ्यासाचेच उपलक्षण आहे.९४. **कोटितीर्थ** म्हणजेच गीतेत 'या ज्ञानासमान पवित्र या जगांत कांहीच नाही (*न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।)'* असे गौरविलेले विशुद्ध ज्ञान.९५. 'या इथे **संक्रमणं** ह्याचा अर्थ इडा आणि पिंगला यांचे सम्यक् क्रमण. इडेचे क्रमण करून प्राण मूलाधाराशीं आला कीं चंद्रग्रहण, पिंगलेंतून मूलाधारांत प्राण आला कीं सूर्यग्रहण, इडा-पिंगलांच्या संधीला (आज्ञाचक्र) प्राण पोंचला कीं अमावास्या, इडेंतून प्राण पिंगलेंत जाणे दक्षिणायन व पिंगलेंतून इडेंत प्राणाचे गमन हे उत्तरायण असे सूतसंहितेंत वर्णन आहे. त्याचा दाखला श्रीस्वामीमहाराजांनी टीकेंत पुढे दिला आहे.९६. उदरालंबन म्हणजे नाभीजवळचे मणिपूर चक्र हीच **गया.** पांच छिद्रांचे हृत्कमल (अनाहत चक्र) हीच द्वारका. कारण तिथेच श्रीकृष्णपरमात्म्याचे वास्तव्य आहे.९७-९८. सुसिद्धिदं (उत्तम सिद्धि देणारे) मन्मथक्षेत्र म्हणजेच ब्रह्मरंध्र (सहस्रार चक्र होय). किंवा अनाहताला **मन्मथ क्षेत्र** आणि ब्रह्मरंध्राला द्वारका असा व्यत्यास केला तरी चालेल. आत्मपुराणांत म्हटले आहे, *'स देवदेवजनकः कपालत्रयमध्यमां। सिमंतिनीनां सीमंते सीमांता विदितां नृणाम्। ततो मनुष्यमात्रस्य पुरा द्वारवती स्मृता। अस्यां यस्मादयं कृष्णः पुराणपुरुषोऽविशत्। ऊर्ध्वभागे ततो द्वारं विद्वद्भिः कीर्त्यते बुधैः।।'* 'तीन कपाळांच्या मध्यभागी स्त्रियांच्या भांगाजवळच्या सीमेला मनुष्यमात्रांची द्वारवती (द्वारका) आहे. त्याच्या वरच्या भागीं ज्ञानी लोकांनी वर्णन केलेले द्वार (ब्रह्मरंध्र) आहे. तो देवदेवांचा (ब्रह्मदेवाचा) पिता, जीवभूत श्रीकृष्णपरमात्मा या ब्रह्मरंध्रांचा भेद करूनच देहामध्यें प्रवेश करतो. त्यामुळे हीच मनुष्यमात्रांची द्वारका होय'१००. असे सर्व नरदेहाचे माहात्म्य श्रीगुरूंनी सांगितल्याने आणि मोक्षमार्गाची सुगमता कळाल्याने ते लोक आनंदित झाले.

हे क्षेत्र, म्हणजे गंधर्वनामक हा देह, श्रेष्ठ आहे. विज्ञान म्हणजे बुद्धी ज्याची उपाधि आहे असे आत्मस्वरूप तिथे अवस्थित आहे. १०१. इथे असा प्रश्न उपस्थित केला जाऊं शकतो की *'द्वा सुपर्णा'* (ऋग्वेद १:१६४:२०) या श्रुतींत दोघांचे अस्तित्व प्रतिपादले असतांना इथे एकाचाच निर्देश कसा केला? त्याचा खुलासा प्रस्तुत श्लोकांत केला आहे. तो अखिलात्मा असूनही प्रतिबिंबरूप असल्याने उपाधीच्या मालिन्याने म्लेच्छ म्हणजे अस्पष्ट उच्चार करणारा - अस्पष्ट आविष्कृत होणारा चिदाभास, त्याचा उद्धार करून शुद्ध आत्मस्वरूपच हार्दाकाशांत स्थिरावले असा आशय आहे. १०२.

प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ त्रयोविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधु साधूदितं क्षेत्र-माहात्म्यं लोकपावनम् । जगन्निवासो भगवान् यत्रोवासैष लीलया ।।१।।**
**तत्र तत्राखिला देवा ऋषियोगिमुनीश्वराः । निवसन्ति पुनस्तत्र ननु तीर्थानि सर्वशः ।।२।।**
**कृष्णापञ्चनदीयोगो धन्योऽन्योऽप्येष तादृशः । स भीमामरजायोगः साक्षात्तु भगवानिह ।।३।।**
**पशुपक्षिमृगा मीनास् तत्रत्याः स्नानपानतः । धन्या एव पुनर्नृणां धन्यत्वं किमु वर्ण्यते ।।४।।**

नामधारक उवाच। लोक+पावनं क्षेत्र+माहात्म्यं साधु साधु उदितम्। एष जगत्+निवासः भगवान् यत्र लीलया उवास।१। तत्र तत्र अखिलाः देवा++ऋषि+योगि+मुनि+ईश्वराः निवसन्ति। पुनः तत्र सर्वशः तीर्थानि (अपि निवसन्ति)।२। कृष्णा+पञ्चनदी+योगः धन्यः। अन्यः अपि तादृशः एष भीमा+अमरजा+योगः सः भगवान् तु इह साक्षात् (वर्तते)।३। तत्रत्याः पशु+पक्षि+मृगा+मीनाः स्नान+पानतः धन्याः एव। पुनः नृणां धन्यत्वं किम् उ वर्ण्यते?४।

श्रीगणेशाय नमः। *तेविसाव्यांत म्लेच्छ राजाचा करूनि उद्धार। अदृश्य झाला अभक्तांना, परि प्रत्यक्ष आजही भक्तांना।।२३।।* श्रीगुरू उगी राहिलेले पाहून नामधारक दहा श्लोकांत त्यांना विचारीत आहे. 'छान छान! सर्व जनांना पावन करणारे क्षेत्रमाहात्म्य आपण फार उत्तम सांगितलेत. हा जगन्निवास भगवंत लीलेने जिथे जिथे निवास करतो,(१) तिथे तिथे सर्व देव, ऋषी, मुनी राहतात. त्यांच्याबरोबरच साहजिकच सर्व तीर्थेही तिथे येतात.२. कृष्णा आणि पञ्चगंगा यांचा संगमही श्रीगुरूंच्या निवासाने धन्य झाला आहे. तसाच हा दुसरा भीमा आणि अमरजा यांचा संगम भगवंताच्या साक्षात् वास्तव्याने धन्य झाला आहे.३. या संगमाच्या जलात स्नान करून आणि ते पिऊन येथील पशू, पक्षी आणि जलचरही धन्य झाले आहेत. मग येथील मानवांची धन्यता किती म्हणून वानावी?४.

**यन्माहात्म्यश्रवणतो लीयन्ते पापराशयः । किं पुनस्तन्निवसतां सतां वाच्या हि सद्गतिः ।।५।।**
**भगवद्भक्तियुक्ता ये मुक्तिस्तेषां करे स्थिता । मुक्तिं ते परिभाव्यातो भक्तिमेवाश्रयन्त्यरम् ।।६।।**
**मुक्त्यपेक्षा पुराभून्मे सा भवत्कृतबोधतः । व्यपेता दूरतो वृद्धाहैतुकीभक्तियोगतः ।।७।।**
**अतः प्रियतमं विष्णोः कीर्तनश्रवणादिकं । तद्गुणश्रवणं श्राव्यं रोचते मे विशेषतः ।।८।।**
**तस्मात्स्वर्गायचरित-पूरितात्मन्वदस्व मे । श्रीगुरोश्चरितं रम्यं मङ्गलं पावनं परम् ।।९।।**
**को म्लेच्छः सोऽतिहीनोऽपि कृपापात्रं परात्मनः । कथं जातो हि भवता यत्तूक्तं म्लेच्छ उद्धृतः ।।१०।।**

यत्+माहात्म्यं श्रवणतः पाप+राशयः लीयन्ते तत्+निवसतां सतां सद्गतिः हि किं पुनः वाच्यते?५। 'ये भगवत्+भक्ति+युक्ता मुक्तिः तेषां करे स्थिता। अतः ते मुक्तिं परिभाव्य अरं भक्तिं एव आश्रयन्ति।६। पुरा मे मुक्ति+अपेक्षा अभूत्। सा भवत्+कृत+बोधतः अहैतुकी+भक्ति+योगतः दूरतः व्यपेता।७। अतः विष्णोः कीर्तन+श्रवण+आदिकं प्रियतमम्। तत्+गुण+श्रवणं मे विशेषतः रोचते।८। तस्मात् (हे) स्वर्गाय+चरित+पूरित+आत्मन्, मे श्रीगुरोः रम्यं, मङ्गलं पावनं परं चरितं वदस्व।९। कः सः म्लेच्छः? अति+हीनः अपि पर+आत्मनः कृपा+पात्रं जातः? यत् हि भवता उक्तं 'म्लेच्छ उद्धृतः।'१०।

ज्या गाणगापूर क्षेत्राचे माहात्म्य कानांवर पडल्यानेही पापांच्या राशी नष्ट होतात तिथे राहणाऱ्या सज्जनांच्या सद्गतीविषयी कितीही वर्णन केले तरी अपुरेच ठरणार आहे.'५. 'भगवंताची भक्ती ज्यांना लाभली आहे त्यांना मुक्ती करतलावरच असते. म्हणून ते मुक्तीचा अनादर करून भक्तीचाच आश्रय करतात.६. मलाही पूर्वी मुक्तीची अपेक्षा होती. पण आपण केलेल्या उपदेशाने ही अहैतुकी भक्ती प्राप्त झाल्याने मुक्तीची इच्छा दूर झाली.७. आता मला सर्वव्यापी श्रीगुरूंचे कीर्तन, श्रवण, अर्चन इत्यादि अत्यंत प्रिय वाटतात. विशेषतः त्यांच्या गुणांचे श्रवण मला फारच आवडते!८. त्याकरिता स्वर्गातही गायल्या जाणाऱ्या गुरुचरित्राने ज्यांची बुद्धी संपृक्त झाली आहे अशा सिद्धमुने, मला श्रीगुरूंचे रम्य, मंगल आणि पावन चरित्र सांगा.९. तो म्लेच्छ कोण जो श्रीगुरुपरमात्म्याच्या कृपेला पात्र झाला? कारण आपण म्हणत होता की एका म्लेच्छाचा श्रीगुरूंनी उद्धार केला!'१०.

### ।। सिद्ध उवाच ।।

**धन्योऽसि तेऽद्य भगवत्प्रसादान्मतिरीदृशी । अतस्तच्चरितं वक्तुमानन्दोऽतीव वर्धते ।।११।।**
**यदा स्थितः कुरुपुरे प्रत्यक्षं श्रीपदस्तदा । रजकः प्रत्यहं भेजे तं स्तोत्रैर्नतिभिः सदा ।।१२।।**
**कदाचिदाह तं तुष्टः श्रीपादो भाविकोऽसि रे । कुर्वकण्टकसाम्राज्यं तच्छ्रुत्वा सोऽतिहर्षितः ।।१३।।**
**सोऽलङ्कृतं नृपं नद्यां क्रीडन्तं युवतीयुतम् । चतुरङ्गबलोपेतं दृष्ट्वा स्वगतमब्रवीत् ।।१४।।**

सिद्ध उवाच। धन्यः असि! अद्य भगवत्+प्रसादात् ते ईदृशी मतिः। अतः तत्+चरितं वक्तुं आनन्दः अतीव वर्धते।११। यदा कुरुपुरे प्रत्यक्षः श्रीपदः स्थितः तदा रजकः तं प्रति+अहं सदा स्तोत्रैः नतिभिः भेजे।१२। कदाचित् तुष्टः श्रीपदः तं आह, 'रे, भाविकः असि। अकण्टकं साम्राज्यं कुरु!' तत् श्रुत्वा सः अति+हर्षितः।१३। सः नद्यां क्रीडन्तं अलङ्कृतं युवतीयुतं चतुः+अंग+बल+उपेतं नृपं दृष्ट्वा स्व+गतं अब्रवीत्।१४।

वरच्या श्लोकांतले **स्वर्गाय** पद वेगळे काढून स्वर्गासाठी - कर्मनिष्ठांसाठी स्वर्गप्राप्ती आणि मुमुक्षूसाठी (सु+अर्ग) चांगल्या ज्ञानप्राप्तीसाठी जे गाइले जाते असा दुहेरी अर्थ करता येतो.

सिद्धमुनी उत्तरले, 'धन्य आहेस! आज भगवंताच्या प्रसादानेच तुला अशी बुद्धी झाली आहे. त्यामुळे त्या श्रीगुरूंचे चरित्र सांगण्याला मला अतीव आनंद वाटतो आहे.'११. श्रीगुरू (सातव्या अध्यायात सांगितलेल्या) कुरुगड्डीला असताना एक परीट प्रतिदिन सदा श्रीगुरूंची नमस्कार आणि स्तोत्र यांसह सेवा करीत असे.१२. त्या सेवेने संतुष्ट झालेले श्रीगुरू एकदा त्याला म्हणाले, 'अरे रजका, तू भाविक आहेस! तू अकंटक (शत्रूरहित) साम्राज्याचा अधिपती होशील!' ते ऐकून त्याला खूप आनंद वाटला.१३. त्याने एकदा एक वस्त्रे आणि भूषणे यांनी सजलेला यवन राजा नदीत क्रीडेला आलेला पाहिला. त्याच्याबरोबर अनेक तरुण स्त्रिया, चतुरंग सेना इत्यादि राजपरिवारही होता.१४.

**गुरुः कोऽस्य कुतस्त्वीदृग्-भाग्यं तज्जीवितं वरम् । क्व वार्तास्य मयीत्येतज्-ज्ञात्वा श्रीपाद आह तम् ॥१५॥**
**ज्ञातं ते हृद्गतं त्वत्र जरन्नार्होऽसि जन्मनि । राज्यं भोक्तुमतो भुङ्क्ष्व जन्मन्येष्येऽर्पितं ध्रुवम् ॥१६॥**
**सम्मतं भवदुक्तं हि यूनो राज्यरसज्ञता । राज्येऽप्यस्तु स्मृतिस्ते म इति तं स स्म याचते ॥१७॥**
**श्रीपादोऽपि तथेत्यूचे प्रेत्यापि रजकस्ततः । वैडूर्यनगरे म्लेच्छः सार्वभौमोऽभवन्नृपः ॥१८॥**

'अस्य गुरुः कः? कुतः ईदृक् भाग्यम्? तत् जीवितं वरम्! मयि अस्य क्व वार्ता?' एतत् ज्ञात्वा श्रीपाद तं आह।१५। 'ते हृत्+गतं ज्ञातम्। अत्र जन्मनि जरन् राज्यं भोक्तुं अर्हः न असि। अतः एष्ये जन्मनि ध्रुवं (राज्यं) अर्पितम्। भुंक्ष्व।'१६। 'भवत्+उक्तं संमतं हि। यूनः राज्य+रस+ज्ञता। राज्ये अपि मे ते स्मृतिः अस्तु,' इति सः तं याचते स्म।१७। श्रीपादः अपि 'तथा' इति ऊचे। ततः रजकः अपि प्रेत्य वैडूर्यनगरे सार्वभौमः म्लेच्छः नृपः अभवन्।१८।

त्या राजाला पाहून त्याच्या मनात विचार आला, 'कोण ह्या राजाचा गुरू असेल? कसे त्याला एवढे ऐश्वर्य मिळाले असेल? त्याचे जीवन हे खरे जीवन आहे! माझ्यासारख्याला अशा भाग्याची वार्ता तरी कुठली?' त्याच्या मनातील हे विचार श्रीपादप्रभूंनी ओळखले आणि त्याला म्हणाले.१५.

'तुझ्या मनातली वासना मी जाणली आहे. या जन्मात आता तू वृद्ध झाला आहेस. हे वय राज्य भोगण्याला योग्य नाही. तेव्हा तुला पुढच्या जन्मात निश्चयपूर्वक राज्य दिले. ते तू सुखाने भोग!'१६. 'आपले म्हणणे मान्य आहे, महाराज! बालपणी रसचंदनादि भोगांचे अज्ञान असते तर म्हातारपणी ते ज्ञान असूनही ते भोगण्याची शक्ती नसते. त्यामुळे ते सर्व राज्यभोग तारुण्यातच सुखकारक असतात. मात्र त्या राज्यातही मला आपली स्मृती असावी हीच प्रार्थना आहे.' अशी त्याने याचना केली.१७. श्रीपादांनीही 'तथास्तु' म्हणून आशीर्वाद दिला. त्यानंतर थोड्याच काळात तो परीट भक्त मृत्यू पावला आणि त्याचा जन्म बिदर येथे राजघराण्यात झाला. श्रीगुरूंच्या आशीर्वादानुसार तो सार्वभौम यवन राजा झाला.१८.

**म्लेच्छधर्मारुचिः पूर्व-संस्काराद्देवविप्रभाक् । शुद्धात्मा दानधर्मज्ञः सर्वभूतसमोऽभवत् ।।१९।।**
**तं तत्पुरोहिता ऊचुः स्वधर्मं सेवयोत्तमम् । मृषोद्यवर्णधर्मोऽयमग्राह्यो मनसाप्यसन् ।।२०।।**
**मुखाद्यावयवैर्देह-साम्ये वर्णक्रमः कथम् । अचेतनोपलेध्मादौ देवतान्यत्र वा कथम् ।।२१।।**
**राजा तानाह धीमान्द्यमिदं सृष्टं परात्मना । गुणकर्मभिदा चातुर्वर्ण्यं देवस्तु सर्वगः ।।२२।।**

पूर्व+संस्कारात् म्लेच्छ+धर्म+अरुचिः देव+विप्र+भाक् शुद्ध+आत्मा दान+धर्म+ज्ञः सर्व+भूत+समः अभवत्।१९। तं तत्+पुरोहिताः ऊचुः। उत्तमं स्वधर्मं सेवय। अयं वर्ण+धर्मः मृषा+उद्यः मनसा अपि अग्राह्यः असन्।२०। मुखा+आदि+अवयवैः देह+साम्ये वर्ण+क्रमः कथम्? अचेतन+उपल+इध्म+आदौ अन्यत्र वा देवता कथम्?२१। राजा तान् आहे, 'इदं धी+मान्द्यम्! पर+आत्मना गुण+कर्म+भिदा चातुः+वर्ण्यं सृष्टम्। देवः तु सर्वगः।'२२।

बृहदारण्यक उपनिषदात (४:४:२) सांगितल्याप्रमाणे पहिल्या जन्मातील ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन तो जन्माला आला होता. पूर्वजन्मीच्या संस्कारांनी त्याला यावनी धर्माची आवड नव्हती. देवाब्राह्मणांचा तो आदर करीत असे. तो शुद्ध बुद्धीचा, दानधर्माची जाण असलेला, सर्व जीवमात्रात समभाव बाळगणारा असा झाला.१९. त्याला त्याच्या धर्मगुरूंनी सांगावे, 'राजेसाहेब, आपण आपला ह्या उत्तम यवनधर्माचे पालन करावे. हा जो वर्णाश्रमधर्म आहे तो मिथ्या आहे असे आपले धर्मशास्त्र सांगते. तो धर्म मनातही आणू नये इतका वाईट आहे.'२०. ते यावनी पुरोहित पुढे सांगतात, 'तोंड, हात, पाय इत्यादि अवयव सारखेच असताना हा ब्राह्मण, हा क्षत्रिय असे वर्णभेद कसे करतात? गाय, घोडे इत्यादि प्राण्यात त्यांच्या अवयवांवरून, आवाजावरून, त्यांच्या मलाच्या वेगळेपणावरून जसा भेद करता येतो किंवा स्त्री आणि पुरुषांतही योनी, लिंग आदींवरून फरक दिसतो तसा वर्णांमध्ये करता येत नाही. दगड, लाकूड, माती, सोने इत्यादि अचेतन वस्तूंच्या प्रतिमांत तसेच पाणी, अग्नी यांच्यात देवत्व कसे येईल?'२१. राजा त्यांचे म्हणणे खोडून टाकीत म्हणतो, 'हे तुमच्या बुद्धीचे मांद्य आहे. त्यांच्या धर्मग्रंथांत (भ.गीता ४:१३) सांगितल्याप्रमाणे हे चार वर्ण सत्त्व-रज-तम आदि गुणांच्या आणि शमदमादि कर्मांच्या विभागणीने (भ.गीता १८:४२-४४) परमेश्वरानेच केलेले आहेत. आणि देव तर सर्वव्यापी आहे असे तुम्हालाही मान्य आहेच ना? या संपूर्ण जगाचे अधिष्ठान परमात्माच आहे तेव्हा तो चेतन अचेतन अशा सर्वच वस्तूंत आहेच.२२.

**स्थूलाक्षराल्लिपिज्ञानं शिशोरिव परात्मनः । गुरूक्तार्चाकल्पनया हृत्स्थैर्याद्बोध उद्भवेत् ।।२३।।**
**सतोम्ब्वाद्येऽपि बिम्बस्य प्रतीतिर्न मलान्विते । तथात्मनो न मलिने प्रतीतिः सा तु निर्मले ।।२४।।**
**तत्स्वप्रमानादिवेद-प्रोक्तधर्मपरान् द्विजान् । नमस्कुरुत भक्त्या ते देवानामपि देवताः ।।२५।।**
**वेदानुसारिस्मृत्युक्त-धर्मकर्मानुवर्तिनः । पूज्या अतो द्वेषशङ्कां त्यजतेत्याह तान्नृपः ।।२६।।**
**ततः कालेन कियता स्फोटकोऽङ्के समुत्थितः । तेन राड् व्यथितोऽत्यन्तं मोघाभूत्तत्प्रतिक्रिया ।।२७।।**

शिशोः स्थूल+अक्षरात् लिपि+ज्ञानं इव गुरु+उक्त+अर्चा+कल्पनया हृत्+स्थैर्यात् पर+आत्मनः बोध उद्भवेत्।२३। सतः अम्बु+आद्ये बिम्बस्य प्रतीतिः, न मला+अन्विते। तथा आत्मनः मलिने न प्रतीतिः सा तु निर्मले।२४। तत् स्व+प्रम+अन+आदि+वेद+प्रोक्त+धर्म+परान् द्विजान् भक्त्या नमस्कुरुत। ते देवानां अपि देवताः।२५। 'वेद+अनुसारी+स्मृति+उक्त+धर्म+कर्म+अनुवर्तिनः पूज्याः। अतः द्वेष+शंकां त्यजत'इति नृपः तान् आह।२६। ततः कियता कालेन अङ्के स्फोटकः समुत्थितः। तेन राट् अत्यंतं व्यथितः। तत्+प्रतिक्रिया मोघा अभूत्।२७।

मूर्तिपूजेविषयी विचाराल तर लहान मुलांना जशी मोठी अक्षरे शिकवून मग सूक्ष्म लिपीचे ज्ञान करून देतात तसेच गुरूंनी सांगितलेल्या किंवा परंपरेने आलेल्या मूर्तीच्या चिंतनाने मन स्थिर झाल्यावर निराकार परमेश्वराचे ज्ञान होते.२३. पाणी असो वा आरसा असो, स्वच्छ असेल तरच त्यांत आपल्या मुखाचे वगैरे प्रतिबिंब चांगले दिसते. ते मलीन असेल तर तसे दिसणार नाही. त्याचप्रमाणे रागद्वेषादि दोषांनी चित्त मलीन असेल तरच अंतरात्म्याची प्रचीती येते.२४. हे सर्व ज्ञान ज्या वेदांत सांगितले आहे ते स्वतःप्रमाण आणि अनादि आहेत. अशा वेदांत सांगिलेल्या धर्माचे अनुसरण करणाऱ्या ब्राह्मणांना भक्तीपूर्वक नमस्कार करावा. ते देवांचेसुद्धां देव आहेत.' २५. 'वेदांनाच अनुसरणाऱ्या स्मृतींनी ग्रथित केलेल्या धर्मांचे आणि कर्मांचे अनुशीलन करणाऱ्यांचा आदरच केला पाहिजे. तरी तुम्ही त्यांचा द्वेष करू नका.' असे राजाने त्या पुरोहितांना समजावले.२६. पुढे कांही काळ गेल्यावर राजाच्या मांडीवर एक मोठा फोड झाला. त्याने राजा अगदी त्रासून गेला. त्याच्यावरे कांहीच उपाय चालेनात.२७.

**राजा यातनया त्यक्त-भुक्तिसुप्तिरतिर्द्विजम् । आहूय तत्प्रतीकारं पप्रच्छ विनयान्वितः ।।२८।।**
**स प्राह नात्र वक्तव्यं भवान्म्लेच्छो द्विजोऽस्म्यहम् । जनश्रुतिभियैकान्ते वक्तव्यं भूपसत्तमम् ।।२९।।**
**अथापतुरुभौ पाप-नाशतीर्थं द्विजोऽब्रवीत् । भो पूर्वार्जितदुष्कर्म-योगाद्रोगसमुद्भवः ।।३०।।**

यातनया त्यक्त+भुक्ति+सुप्ति+रतिः राजा द्विजं आहूय विनय+अन्वितः तत्+प्रतीकारं पप्रच्छ।२८। सः प्राह, '(हे) भूप+सत्तम, भवान् म्लेच्छः, अहं द्विजः अस्मि। अत्र न वक्तव्यम्। जन+श्रुति+भिया एकांते वक्तव्यम्।' २९। अथ उभौ पाप+नाश+तीर्थं आपतुः। द्विजः अब्रवीत्, 'भो (राजन्) पूर्व+अर्जित+दुः+कर्मात् रोग+समुद्भवः।'३०।

त्या फोडाच्या वेदनांनी राजाला खाणे-पिणे, झोप किंवा कामसेवन सुचेनात. तेव्हा त्या राजाने एका ब्राह्मणाला बोलावून त्या फोडावर उपाय विचारले.२८. तो ब्राह्मण त्याला म्हणाला, 'राजेसाहेब, आपण यवन जातीचे आहात आणि मी तर ब्राह्मण आहे. इथे आपण बोललो तर त्याचा उगीच बोभाटा होईल. तेव्हा आपण एकांतात कुठे तरी जाऊन बोलू या.'२९.

**जन्मांतराने कर्माचा भोग -** राजाला त्याचे म्हणणे पटले आणि ते दोघेही बिदरजवळच्या पापनाशी तीर्थाला गेले. तो ब्राह्मण सांगू लागला, 'माणसाला जे कांही रोग होतात ते पूर्वजन्मींच्या पापकर्मामुळेच होतात.' एका जन्मात केलेली दुष्कर्मे दुसऱ्या जन्मातल्या रोगांचे कारण कसे होतात? अशी शंका घ्यायचे कारण नाही. मृत्यू याचा अर्थ पाचभौतिक देहातून जीवाचे निष्क्रमण. देहापासून जीव वेगळा होतो. देह जरी महाभूतात विलीन झाला तरी आत राहणारा पुरुष तसाच राहतो. जोपर्यंत आत्मज्ञान होत नाही तोपर्यंत तो पुनःपुनः जन्मतो आणि मरण पावतो. छांदोग्य उपनिषदानसार 'त्याची वाचा मनात मिळून जाते, मन प्राणात, प्राण तेजात आणि तेज परदेवतेत मिळून जातात.' वर उद्धृत केलेल्या बृहदारण्यक उपनिषदाच्या मंत्राप्रमाणे '*जीव बाहेर पडला की सर्व प्राण त्याच्यामागे जातात. तो त्याचे ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन जातो.*' प्रश्नोपनिषदांत सांगितले आहे, (हृदयातील एकशे एक नाड्यांपैकी) एका वर जाणाऱ्या नाडीतून..

**दानभेषजसत्तीर्थ-देवसेवादिभिर्भवेत् । तच्छान्तिः साधुदृष्ट्यापि सर्वाघहृतिदक्षया ।।३१।।**
**पुरावन्तीपुरे धर्म-हीनोऽभूद्ब्राह्मणब्रुवः । त्यक्तकर्मा पिङ्गलाख्य-वेश्यासक्तो मदोद्धतः ।।३२।।**

तत्+शान्तिः दान+भेषज+सत्+तीर्थ+देव+सेवादिभिः भवेत्। सर्व+अघ+हृति+दक्षया साधु+दृष्ट्या अपि (तत्+शांतिः भवेत्)। पुरा अवन्तीपुरे धर्म+हीनः त्यक्त+कर्मा पिङ्गला+आख्य+वेश्या+सक्तः मद+उद्धतः ब्राह्मण+ब्रुवः अभूत्।३२।

.. उदान (नावाचा प्राण) पुण्य अधिक असेल तर पुण्यलोकांना नेतो, पाप अधिक असेल तर पापलोकांना नेतो आणि दोन्ही समान असतील तर मनुष्यलोकाला. प्राण तेजासह आत्म्याला यथासंकल्पित लोकाला नेतो.' कठोपनिषदातही (२:२:७) असेच प्रतिपादन आहे. 'आपापल्या कर्मानुसार आणि शास्त्राध्ययनानुसार जीव त्या त्या योनी पावतात.' या सर्व आगमप्रमाणांवरून कर्माचे फल देणाऱ्या ईश्वराच्या प्रेरणेने जन्मांतराचे पापच रोगादि दुःखांचे कारण आहे.३०. 'त्या रोगांचे उपशमन करण्याचे उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. **१. दान -** श्रद्धेने सत्पात्री (योग्य व्यक्तीला) केलेला धनत्याग; **२. भेषज -** आयुर्वेदात सांगितलेले औषध; **३. सत्** साधुसंत, **तीर्थ** गंगादि तीर्थस्थाने आणि **देव** विष्णू, शंकर इत्यादि यांच्या सेवेने; आदि शब्दाने जप, होम इत्यादि घ्यावेत. **४.** शेवटी सर्व पापांचे निवारण करणाऱ्या साधूच्या केवळ कृपाकटाक्षानेही रोगाची शांती होते.'३१. साधूची नुसती दृष्टी जरी पडली तर रोग कसा बरा होतो याविषयी एक आख्यान तो ब्राह्मण राजाला सांगत आहे. पूर्वी उज्जयनी नगरीत एक केवळ नामधारी ब्राह्मण राहत होता. त्याने सर्व धर्म-कर्म यांचा त्याग केला होता. पिंगला नावाच्या वेश्येत त्याचे मन अडकले होते. तो तिच्यासहच राहत असे. पैशाच्या मदाने तो उद्धट झाला होता.३२.

**तत्प्राक्पुण्यचयाद्योगी ऋषभः प्राप तत्र तौ । सेवयामासतुः प्रेम्णा पादसंवाहनादिभिः ।।३३।।**
**स्तुतोऽर्चितो भोजितोऽनु पर्यङ्के शायितोऽमले । पीततत्पादतीर्थाभ्यां तुष्टः सुष्वाप वीजितः ।।३४।।**
**सुप्तोऽपि नमितः प्रातरुत्थायागात्स संस्तुतः । इयत्पुण्येन तौ प्रेत्य जातौ ब्रह्मकुलेऽमले ।।३५।।**
**वज्रबाहोर्दशार्णेशो महिष्याः कुक्षिमाप सः । तत्सपत्नी तदा द्वेषाद् गर्भिण्यै गरलं ददौ ।।३६।।**

तत्+प्राक्+पुण्य+चयात् ऋषभः योगी तत्र प्राप। तौ प्रेम्णा पाद+संवाहनादिभिः सेवयामासतुः।३३। पीत+तत्+पाद+तीर्थाभ्यां स्तुतः अर्चितः भोजितः अनु अमले पर्यंके शायितः तुष्टः।३४। सुप्तः अपि नमितः। प्रातः उत्थाय सः संस्तुतः अगात्। इयत् पुण्येन तौ प्रेत्य अमले ब्रह्म+कुले जातौ।३५। सः दशार्ण+ईशः वज्रबाहोः महिष्याः कुक्षिं आप। तदा तत्+सपत्नी द्वेषात् गर्भिण्यै गरलं ददौ।३६।

त्याच्या कांही पूर्वपुण्याईने तिथे एकदा महान योगी ऋषभदेव आले. त्या ब्राह्मणाने आणि त्या वेश्येने मिळून त्यांची प्रेमाने, पाय चेपून वगैरे सेवा केली.३३. त्यांच्या पायाचे तीर्थ घेतले. त्यांची गोड शब्दांनी स्तुती केली; पूजा केली; त्यांना जेवायला घातले; आणि चांगल्या पलंगावर त्यांची झोपायची सोय केली; त्यांना पंख्याने वारा घातला. अशा रीतीने त्यांनी त्या मुनींना प्रसन्न केले.३४. ते झोपल्यावरही त्यांनी जागून त्यांची झोपमोड होऊ दिली नाही. ते उठल्यावर त्यांना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. त्यानंतर ते ऋषभदेव आले तसे आपल्या वाटेने निघून गेले. त्या ऋषिसेवेच्या पुण्याईने ते दोघेही मृत्यूनंतर शुद्ध राजकुलात जन्माला आले.३५. ती वेश्या दशार्ण देशाचा राजा वज्रबाहू याची पट्टराणी झाली आणि तो ब्राह्मण तिच्या पोटी आला. तेव्हा तिच्या सवतीने मत्सराने त्या गरोदर राणीला विष घातले.३६.

**तेन विद्धापि न मृता दैवात्सा सुषुवे सुतम् । बालोऽपि विषविद्धोऽभूदुभौ जातौ व्रणाङ्कितौ ।।३७।।**
**तदार्तिर्न शशामापि नानोपायैरुभौ सदा । क्रन्दमानौ निराहार-निद्रौ क्षीणौ तु कृच्छ्रतः ।।३८।।**
**राजैकदा पूतिगन्धि-त्रस्तस्तद्वीक्षणात् क्षणात् । सूतमाज्ञाप्य सार्भां तां गमयामास कानने ।।३९।।**
**घोरेऽरण्येऽपि तौ त्यक्त्वा राज्ञे सूतः शशंस तत् । ततो रेमेऽन्यभोगिन्या क्रूरो राजातिहृष्टया ।।४०।।**
**घोरसत्त्वे वने राज्ञी विजने व्रणकर्शिता । अज्ञाताङ्घ्रिगतिस्तन्वी त्रस्ताभूत्कण्टकोपलैः ।।४१।।**

(सा) तेन विद्धा अपि न मृता। सा दैवात् सुतं सुषुवे। बालः अपि विष+विद्धः अभूत्। उभौ व्रण+अङ्कितौ जातौ।३७। तत्+आर्तिः नाना+उपायैः अपि न शशाम। उभौ सदा क्रंदमानौ निः+आहार+निद्रौ कृच्छ्रतः तु क्षीणौ।३८। एकदा राजा तत्+वीक्षणात् पूति+गन्ध+त्रस्तः क्षणात् सूतं आज्ञाप्य तां स+अर्भां कानने गमयामास।३९। सूतः अपि तौ घोरे अरण्ये त्यक्त्वा राज्ञे शशंस। ततः क्रूरः राजा अति+हृष्टया अन्य+भोगिन्या रेमे।४०। घोर+सत्त्वे विजने वने व्रण+कर्शिता अ+ज्ञात+अङ्घ्रि+गतिः तन्वी राज्ञी कण्टक+उपलैः त्रस्ता अभूत्।४१।

पण त्या राणीला त्या विषाची बाधा झाली तरी तिचा मृत्यू झाला नाही. तिच्या सुदैवाने तिने मुलाला जन्म दिला. त्या मुलालाही ते विष बाधले. त्यामुळे दोघांनाही सर्वांगावर व्रण झाले.३७. त्यांच्या त्या रोगावर अनेक उपाय करूनही तो शमला नाही. दोघेही सारखे दुःखाने आक्रोश करायचे. त्यांना न धड आहार ना धड झोप मिळत होती. त्या कष्टांनी ते अगदी क्षीण होऊन गेले.३८. एकदा त्यांची ती अवस्था पाहून आणि त्यांच्या पू आणि दुर्गंधाला विटून राजाने आपल्या सारथ्याला त्यांना तत्काळ अरण्यात सोडून यायची आज्ञा केली.३९. त्याप्रमाणे त्या सारथ्यानेही त्याना रथात घालून दूर निबिड अरण्यात सोडून दिले आणि तसे राजाला येऊन सांगितले. त्या दुष्ट राजाला खूप आनंद झाला आणि तो दुसऱ्या अनभिषिक्त राणीबरोबर रममाण झाला.४०. त्या हिंस्र पशूंनी व्याप्त अशा निर्जन अरण्यात ती अंगावरच्या व्रणांनी पीडलेली, आपली पाउले कुठे पडताहेत याचीही शुद्ध नसलेली रूपवती राणी खड्या-काट्यांनी ठेचकाळत होती. हातात लेकरू घेऊन ती आपल्या दैवालाच बोल लावू लागली.४१.

**धृतार्भा प्राह हा दैव कष्टमीदृक् प्रदर्शितम् । सार्भा खादय हिंस्रैर्मां दुःखबन्धाद्विमोचय ।।४२।।**
**एवं सा विलपन्ती गाः प्रेक्ष्याग्रे मन्दगामिनी । आगत्य प्राह गोपान्भो तृषोत्क्रामन्ति मेऽसवः ।।४३।।**
**तामूचुस्तेऽम्बिवहास्त्यारान् मन्दं सृत्यानया व्रज । सापि गत्वाम्बु पीत्वोचे सरस्तीरस्थ योषितः ।।४४।।**
**कोऽत्र राजा प्रजा हृष्टा भान्ति मे ब्रूत योषितः । ता ऊचुस्त्वत्र राड्वैश्यः साधुः पद्माकरः कृती ।।४५।।**

धृत+अर्भा प्राह, 'हा दैव! ईदृक् कष्टं प्रदर्शितम्। मां स+अर्भा हिंस्रैः खादय। दुःख+बन्धात् विमोचय।'४२। एवं विलपन्ती सा अग्रे गाः प्रेक्ष्य मन्द+गामिनी आगत्य गोपान् प्राह, 'भो, तृषा मे असवः उत्क्रामन्ति।'४३। ते तां ऊचुः, 'इह आरात् अम्बु अस्ति। अनया सृत्या मंदं व्रज।' सा अपि सरः गत्वा अम्बु पीत्वा तीरस्थ योषितः ऊचे।४४। 'योषितः, अत्र कः राजा मे ब्रूत। प्रजा हृष्टा भान्ति।' ता ऊचुः, 'अत्र तु वैश्यः साधुः कृती पद्माकरः राट्।'४५।

'हाय रे दैवा, कसला हा कष्टप्रद वनवास मला दाखवीत आहेस? एखाद्या हिंस्र प्राण्याच्या तोंडून मला माझ्या बाळासकट खाववीत का नाहीस? या दुःखाच्या जोखडांतून मी सुटेन तरी!' अर्थात् वाघसिंहाविषयीच्या औदार्याने ती बोलत नाही तर आपल्या असह्य शारीरिक वेदनांना कंटाळून बोलते आहे. 'मी सर्वदा असावे. माझे अस्तित्व नाही असे कधीही होऊ नये,' हे आत्म्याचे सच्चिदानंदरूपत्व सर्व प्रणिमात्र अनुभवतात. शारीरिक कष्टांना त्रासून दुःखावेशाने निघालेले हे उद्गार आहेत. पुढचे तिचे बोलणे, 'एकदाची मी या दुःखांतून सुटेन तरी!' हेच दर्शवितात.४२. असा शोक करीत करीत ती जात असताना तिला पुढे कांही गाई चरताना दिसल्या. तेव्हा हळूहळू त्या गुराख्यांकडे जाऊन म्हणाली, 'तहानेने माझे प्राण कासावीस झालेत!'४३. ते गुराखी तिला म्हणाले, 'इथे जवळच पाणी आहे. या वाटेने हळूहळू जा.' तेव्हा ती राणी त्या तळ्याकडे गेली आणि पाणी पिऊन तिथे असलेल्या स्त्रियांना म्हणाली, 'बायांनो, इथे कोण बरे राजा राज्य करतो? इथली प्रजा मला आनंदी दिसते.'४४. त्या उत्तरल्या, 'इथे पद्माकर नावाचा एक धर्मशील आणि पुण्यावान् वैश्य राजा आहे.'४५.

**अत्रान्तरेऽपि तद्दास्यः प्राप्तास्ताभिः सहाययौ । राज्ञी विट्पं पुरे दीना स तां पप्रच्छ विस्तरात् ।।४६।।**
**सा शशंसादितः सर्वं दयालुस्तां ररक्ष सः । ततः सुतोऽल्पकालेन व्रणत्रस्तोऽभ्यगान्मृतिम् ।।४७।।**
**विलपन्ती तदा तन्वी प्रेतमज्ञानतोऽब्रवीत् । त्यक्त्वा शोकार्णवे दीनां मातरं मां क्व गच्छसि ।।४८।।**
**त्वत्कृतेऽदो मया भुक्तं कष्टं तन्न स्मरस्यहो । त्वदर्थेऽन्तरिता भर्तृ-पितृमातृहितस्वकाः ।।४९।।**
**त्वदर्थं विस्मृतं दुःखं मया राट्त्यक्तयापि मे । जीवोऽसि त्वयि यातेऽहं मरिष्ये नात्र संशयः ।।५०।।**

अत्र+अन्तरे तत्+दास्यः अपि प्राप्ताः। दीना राज्ञी ताभिः सह पुरे विट्+पं आययौ। सः तां विस्तरात् पप्रच्छ।४६। सा आदितः सर्वं शशंस। सः दयालुः तां ररक्ष। ततः अल्प+कालेन व्रण+त्रस्तः सुतः मृतिं अभ्यगात्।४७। तदा विलपन्ती तन्वी अज्ञानतः प्रेतं अब्रवीत्। 'मां दीनां मातरं शोक+अर्णवे त्यक्त्वा क्व गच्छसि?४८। अहो! मया त्वत्+कृते अदः कष्टं भुक्तं तत् न स्मरसि? त्वत्+अर्थे भर्तृ+पितृ+मातृ+हित+स्वकाः अन्तरिताः। त्वत्+अर्थं राट्+त्यक्तया मया मे दुःखं अपि विस्मृतम्। जीवः असि! त्वयि याते अहं मरिष्ये अत्र न संशयः।५०।'

कांही वेळाने त्या राजाच्या दासीच तिथे आल्या. ती दीनवाणी राणी त्यांच्याबरोबरच नगरात राजाकडे आली. त्याने तिला तिची हकीकत सविस्तर विचारली.४६. तिनेही सुरुवातीपासून आपल्यावर कोसळलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. त्या दयाळू राजाने तिला आश्रय दिला. पुढे थोड्याच दिवसानी तिचा तो व्रणग्रस्त मुलगा मृत्यू पावला.४७. तेव्हा ती सुंदरी विलाप करू लागली आणि स्त्रीसुलभ मोहाने अज्ञानवश त्या प्रेतालाच बोलू लागली. 'बाळा रे, ह्या तुझ्या अनाथ आईला शोकसागरात लोटून तू कुठे जातोस?४८. तुझ्यानिमित्त मी किती कष्ट भोगले त्याची तुला कांहीच आठवण नाही का? तुझ्यामुळेच माझ्या सवतीने मला विष दिले. तुझ्याचसाठी माझी माझ्या पती, पिता, माता, मित्र आणि स्वजन यांच्यापासून ताटातूट झाली.४९. अरे बाळा, तुझ्याकडे पाहूनच मी राजाने मला टाकल्याचे दुःखही पिऊन टाकले. तू माझा प्राणच आहेस! तूच जर सोडून गेलास तरी मीही मरूनच जाणार, यात काय संशय?'५०.

**इति तद्रुदितं श्रुत्वागच्छन्हि ऋषभो मुनिः । विट्पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप करुणार्द्रधीः ।।५१।।**
**कुतो रोदिषि राज्ञीदं जगन्मायामयं ह्यसत् । भौतिके नश्वरे देहे कुतः पुत्रादिकल्पना ।।५२।।**
**कीटः कण्टकधाम्नेव यावदायुर्विचेष्टते । जीवः कर्मौघरचित-धाम्नारब्धाशनोऽवशः ।।५३।।**
**कालकर्मगुणोत्पन्नो नायं सम्बन्धलिङ्गभाक् । चिदंशः सर्वगो नित्यो देहस्त्वाद्यन्तवानचित् ।।५४।।**

इति तत्+रुदितं श्रुत्वा आगच्छन् हि करुणा+आर्द्र+धीः ऋषभः मुनिः विट्+पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप।५१। '(हे) राज्ञि कुतः रोदिषि? इदं माया+मयं जगत् असत् हि। भौतिके नश्वरे देहे पुत्र+आदि+कल्पना कुतः?'५२। 'जीवः कण्टक+धाम्ना कीटः इव यावत् आयुः कर्म+ओघ+रचित+ धाम्ना आरब्ध+अशनः अवशः विचेष्टते।'५३। 'काल+कर्म+गुण+उत्पन्नः अयं न सम्बन्ध+लिङ्ग+भाक्। चित्+अंशः सर्वगः नित्यः। देहः तु आदि+अन्त+वान् अचित्।५४।

तिचा तो विलाप ऐकून ऋषभ मुनी तिथे आले आणि त्या वैश्य राजाला भेटून त्यांनी तिची चौकशी केली. मग ते करुणासागर मुनी तिच्याकडे आले.५१. त्यांना तिच्या शोकाचे कारण कळाले असल्याने आणि हा मृत बालक आपला पूर्वजन्मीचा सेवकच आहे हे जाणून त्यांनी तिला उपदेश करायला आरंभ केला. 'राणीसाहेब, आपण का बरे रडत आहात? हे पुत्र इत्यादि जग खरे असते तर शोकाचे कारण होते. पण हे तर मायेपासून झालेले स्वप्नासारखे आभासिक आहे.' हे प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असताना भास कसा म्हणावा? त्याचे उत्तर दिले आहे, 'ह्या पांचभौतिक नश्वर देहावर पुत्र इत्यादि कल्पना कशी करतेस?'५२. (प्रश्न) 'पण ह्या भौतिक देहाच्या आश्रयानेच जन्मापसून श्मशानापर्यंत सर्व व्यवहार होतातच ना? मग पुत्रादि संबंध होतोच की!' (उत्तर) जसा एखादा किडा आपल्या शरीरावर काटेरी कोष करतो आणि त्यात विविध चेष्टा करतो तसाच जीव आपल्या पूर्वार्जित कर्मापासून झालेल्या देहाने आपल्या प्रारब्धाचा विवशतेने भोग घेतो. तो देहाहून वेगळाच असतो.५३. 'त्या जीवाचे निमित्त कारण कर्म आहे, सत्त्व, रज, तम हे गुण त्याचे उपादान कारण आहेत आणि कर्म पिकण्यासाठी आवश्यक काल हा क्षोभक आहे. त्या जीवाला न पुत्रादि..

**कोऽपि शुग्विषयो नातो धृतिमास्थाय सात्त्विकीम् । भज प्रारब्धमश्नन्ती यावदायुः परेश्वरम् ।।५५।।**
**एतावदृषभः प्रोक्त्वा विरराम तदा तु सा । अबोधविक्लवा प्राह प्रणताश्रूत्तलोचना ।।५६।।**
**भवताऽध्यात्मतत्त्वं मे प्रोक्तं कारुणिकेन सत् । सदा परिचितोऽबोधः स्थेयं नैतेन तन्मयि ।।५७।।**

कः अपि शुक्+विषयः न। अतः सात्त्विकीं धृतिं आस्थाय यावत् आयुः प्रारब्धं अश्नंन्ती पर+ईश्वरं भज।५५।' ऋषभः एतावत् प्रोक्त्वा विरराम। तदा सा तु अबोध+विक्लवा प्रणता अश्रु+उत्त+लोचना प्राह।५६। 'कारुणिकेन भवता मे अध्यात्म+तत्त्वं सत् प्रोक्तम्। अबोधः सदा परिचितः, एतेन तत् मयि न स्थेयम्।'५७।

..संबंध आहेत न स्त्रीपुरुषलिंग आहे. तो चैतन्याचा अंश असल्याने सर्वव्यापी आहे. अशा ह्या नित्य शाश्वत जीवाला अंतच नाही. मग त्याचा शोक का म्हणून करायचा? देह तर बोलूनचालून आदि आणि अंत असलेली जड वस्तू आहे. तिचाही शोक करणे व्यर्थ आहे.'५४. 'याप्रमाणे, हे राणी, शोकाचे कांही कारणच नाही. तरी सात्त्विक धैर्याचा अवलंब करून जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत प्रारब्ध भोगीत परमेश्वराची भक्ती कर!'५५.

ऋषभदेव एवढे बोलून थांबले. तेव्हा अज्ञानाने बधीर झालेली राणी, मुनींपुढे नम्र होऊन पाणावलेल्या डोळ्यांनी म्हणाली, 'आपण मोठ्या कळवळ्याने मला हे समीचीन दुर्लभ अध्यात्मज्ञान सांगितले खरे! पण सतत अज्ञानाच्याच छायेत असणाऱ्या माझ्या मनात ते स्थिरावत नाही.' कठोपनिषदांत (१:२:७) म्हटलेच आहे, 'अनेकांना ते (आत्मतत्त्व) ऐकूनही कळत नाही.'५७.

**येन मे सुप्रसन्नं स्यान् मनस्तद्धि विधीयताम् । ईशेन प्रेरितो दुःख-दशायामपि मे भवान् ।।५८।।**
**स तच्छ्रुत्वा सकारुण्यं बालं ज्ञात्वा स्वसेवकम् । प्रसन्नोऽभूत्स नत्यैव फलन्त्यत्र हि साधवः ।।५९।।**
**तपउज्ज्वलितात्मा स साक्षाच्छम्भुरिवापरः । चिक्षेप भस्म तद्गात्रे स सुप्तोत्थितवत्स्थितः ।।६०।।**
**दत्वासिं शैवकवचं नागायुतबलं मुनिः । भूयादजेयो भद्रायू राजशास्तेत्युवाच सः ।।६१।।**

'येन मे मनः सुप्रसन्नं स्यात् तत् हि (भवता) विधीयताम्। मे दुःख+दशायां अपि भवान् ईश्वरेण प्रेरितः।'५८। सः तत् स+कारुण्यं श्रुत्वा बालं स्व+सेवकं ज्ञात्वा सः प्रसन्नः अभूत्। अत्र साधवः नत्या एव हि फलन्ति।५९। तप+उज्ज्वलित+आत्मा साक्षात् अपरः शम्भुः इव तत्+गात्रे भस्म चिक्षेप। सः सुप्त+उत्थितवत् स्थितः।६०। मुनिः असिं शैव+कवचं (तथा) नाग+अयुत+बलं दत्वा सः उवाच, 'अजेयः भद्र+आयुः राज+शास्ता भूयात्' इति उवाच।६१।

'ज्यायोगे माझे मन सुप्रसन्न होईल असेच आपण करावे. मन प्रसन्न झाले की सर्व दुःखांचा नाश होतो (भ.गीता २:६५) माझ्या ह्या दुःखावस्थेत आपल्याला ईश्वरानेच पाठविले आहे!'५८. ते ऋषभदेव तिचे ते काकुळतीचे बोलणे ऐकून आणि तो बालक आपला सेवक आहे हे जाणून प्रसन्न झाले. खरोखर या भूतलावर साधू केवळ प्रणामानेच फलदायी होतात. (अर्थांतरन्यास) आश्वलायन गृह्यसूत्रानुसार (१:१:५) 'देवता नमस्काराचे उल्लंघन करीत नाहीत.'५९. तपाने अंतर्बाह्य तेजस्वी असे ते साक्षात् शंकरच जणू होते. त्यांनी त्या बालकाच्या शरीराच्या सर्व भागांवर भस्म प्रोक्षण केले. त्याबरोबर तो बालक झोपेतून जागल्यासारखा उठून बसला.६०.

ऋषभ मुनींनी त्याला खड्ग, शैव कवच आणि दहा हजार हत्तींचे बळ दिले आणि 'तूं अजिंक्य, दीर्घायुषी आणि राजाला शासन करणारा होशील' असा आशीर्वाद दिला. इथे श्रीस्वामिमहाराजांनी स्कंद पुराणांतील (ब्रह्मोत्तर खंड १२:३५:४२) पुढील श्लोक उद्धृत केले आहेत. '*पुनश्च भस्म संमंत्र्य तदङ्गं परितोऽस्पृशत्। खड्गशङ्खाविमौ दिव्यौ परसैन्यविनाशिनौ।। आत्मसैन्यस्वपक्षाणां शौर्यतेजविवर्धनौ। एतयोश्च प्रसादेन शैवेन कवचेन च।। द्विषट्सहस्रनागानां बलेन महतापि च। भस्मधारणसामर्थ्याच्छत्रुसैन्यं विजेष्यति।। प्राप्य सिंहासनं पित्र्यं गोप्ताऽस्ति पृथिवीमिमाम्।।*'६१.

**तदा माता सुतोऽपि द्राग् दिव्यगात्रौ बभूवतुः । एतावान् साधुमहिमा तस्मात्तं शरणं व्रज ॥६२॥**

**॥ राजोवाच ॥**

**साधु श्राव्यं त्वया प्रोक्तं सन्माहात्म्यं द्विजोत्तम । क्वास्त एतादृशः साधुस्तन्मे कथय भूसुर ॥६३॥**
**म्लेच्छोऽयं कथमस्मै तत्कथनीयमिति प्रिय । न मन्तव्यं हि दासोऽहं ब्राह्मणानां विशुद्धधीः ॥६४॥**

**॥ विप्र उवाच ॥**

**मया तु भीमामरजा-सङ्गमे कश्चनास्ति सन् । साक्षात् परेश्वर इव श्रुतस्तं शरणं व्रज ॥६५॥**

'तदा माता, सुतः अपि दिव्य+गात्रौ बभूवतुः। एतावान् साधु+महिमा! तस्मात् तं शरणां व्रज।'६२। राजा उवाच। '(हे) द्विज+उत्तम, त्वया श्राव्यं सत्+माहात्म्यं साधु प्रोक्तम्। (हे) भू+सुर, एतादृशः साधुः क्व आस्ते, मे कथय।'६३। '(हे) प्रिय, अयं म्लेच्छः अस्मै कथं कथनीयं इति न मन्तव्यम्। अहं विशुद्ध+धीः, ब्राह्मणानां दासः।'६४। विप्र उवाच। 'मया तु श्रुतं, भीमा+अमरजा+सङ्गमे कश्चन पर+ईश्वर इव अस्ति। तं शरणं व्रज।'६५।

तेव्हा लगेच त्या मायलेकांची शरीरे व्रणरहित आणि दिव्य झाली. 'राजेसाहेब, असा हा संतांचा महिमा आहे. तेव्हा तुम्ही त्यांना शरण जा.'६२. राजाने विचारले, 'ब्रह्मश्री, आपण हे श्रवणीय असे साधूंचे माहात्म्य छान सांगितलेत. असा संतश्रेष्ठ मला कुठे भेटेल ते मला सांगा.'६३. 'हा मुसलमान आहे, ह्याला कसे सांगावे?' असा विचार कृपया मनात आणू नका. मी शुद्ध बुद्धीने विचारीत आहे आणि मी ब्राह्मणांचा सेवक आहे!'. त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'भीमा-अमरजा संगमावर असा कुणी एक परमेश्वरस्वरूप महात्मा आहे, असे माझ्या ऐकण्यात आले आहे. तुम्ही त्यांना शरण जा!'६५.

**तच्छ्रुत्वा सत्वरं राज्यमेत्य राजा बलान्वितः । प्रतस्थे स्वासनारूढः साधुसंदर्शनाय सः ।।६६।।**
**गन्धर्वपुरमासाद्य पौरान् पप्रच्छ कश्चन । आस्तेऽत्र तापसस्तं मे भवन्तो दर्शयन्त्वरम् ।।६७।।**
**म्लेच्छान्दृष्ट्वापि ते भीता नोचुः क्रुद्धोऽब्रवीन्नृपः । तद्दर्शनायागतोऽस्मि कुत्रास्ते स तु कथ्यताम् ।।६८।।**
**तदोचुः सङ्गमेऽस्तीति तच्छ्रुत्वा सत्वरं नृपः । पादचारी नदीं गत्वा ददर्श श्रीगुरुं परम् ।।६९।।**
**तमपि प्रेक्ष्य भगवान् प्राह रे रजकानुग । कुत्र तिष्ठसि कच्चित्त्वं क्षेमी नेहागतः कुतः ।।७०।।**

तत् श्रुत्वा सः राजा सत्वरं राज्यं एत्य बलान्वितः स्वासन+आरूढः साधु+संदर्शनाय प्रतस्थे।६६। गन्धर्वपुरं आसाद्य पौरान् पप्रच्छ, 'अत्र कश्चन तापसः आस्ते। भवन्तः तं मे अरं दर्शयन्तु।'६७। ते म्लेच्छान् दृष्ट्वा भीताः न ऊचुः। नृपः क्रुद्धः अब्रवीत्। 'तत्+दर्शनाय आगतः अस्मि। सः तु कुत्र आस्ते कथ्यताम्।'६८। तदा (ते) ऊचुः, 'सङ्गमे अस्ति' इति। तत् श्रुत्वा नृपः सत्वरं पादचारी गत्वा परं गुरुं ददर्श।६९। भगवान् अपि तं प्रेक्ष्य प्राह, 'रे रजक, अनुग, कुत्र तिष्ठसि? कच्चित् त्वं क्षेमी? कुतः इह न आगतः?'७०।

त्या ब्राह्मणाच्या सांगण्यानुसार तो राजा लगेच घाईने बिदरला आला आणि आपल्या पालखीत बसून सैन्यासह संतदर्शनासाठी गाणगापूरला निघाला.६६. तिथे येऊन त्याने तिथल्या लोकांना विचारले, 'इथे कुणी तपस्वी महात्मे राहतात; ते कुठे आहेत ते मला लवकर दाखवा!'६७. नगरवासी त्या सगळ्या मुसलमानांना पाहून घाबरून कांहीच बोलेनात. त्यावर राजा चिडून म्हणाला, 'अहो, मी त्यांच्या दर्शनासाठी आलो आहे. ते कुठे आहेत ते सांगा ना!'६८. मग त्यांनी त्याला सांगितले की 'स्वामी संगमावर आहेत.' ते ऐकताच राजा पालखीतून उतरला आणि लगबगीने पायीच चालत नदीवर जाऊन त्याने त्या परमश्रेष्ठ श्रीगुरूंचे दर्शन घेतले.६९. त्याला पाहताच श्रीगुरू म्हणाले, 'अरे माझ्या भक्ता रजका, कुठे असतोस? तू सकुशल आहेस ना? इतके दिवस का आला नाहीस? मला सांग!'७०.

**तच्छ्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्धप्राक्स्मृतिरब्रवीत् । त्वद्दत्तराज्यसक्तेन तवाङ्घ्री विस्मृतौ मया ।।७१।।**
**योऽहं प्राग्रजकः सार्व-भौमः सोऽभवमीदृशी । त्वत्कृपा सत्यसङ्कल्प मम मन्तून् क्षमस्व भोः ।।७२।।**
**श्रीपाद रजकं कृष्णा-विहारे पाहि मानुगम् । लोलन्मस्तकबाह्वङ्घ्रि गलद्धर्षाश्रुमानतम् ।।७३।।**
**स्फोटकार्तिनिमित्तेन लब्धं ते दर्शनं हरे । अन्तर्गतापि संविन्मे लब्धैतर्हि निमेषतः ।।७४।।**

तत् श्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्ध+प्राक्+स्मृतिः अब्रवीत्। 'मया त्वत्+दत्त+राज्य+सक्तेन तव अङ्घ्री विस्मृतौ।'७१। '(हे) सत्य+सङ्कल्प, यः अहं प्राक् रजकः सः सार्वभौमः अभवम् ! ईदृशी त्वत्+कृपा। भोः मम मन्तून् क्षमस्व।'७२। '(हे) कृष्णा+विहारे श्रीपाद, लोलन्+मस्तक+बाहु+अङ्घ्रि गलत्+हर्षाश्रुं, आनतम् मां अनुगं पाहि।'७३। '(हे) हरे, स्फोटक+आर्ति+निमित्तेन ते दर्शनं लब्धम्। मे संवित् अन्तः+गता अपि एतर्हि निमेषतः लब्धा।'७४।

श्रीगुरूंचे वचन कानांवर पडताच राजाची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि हेच आपले गुरू श्रीपाद आहेत हे जाणून तो म्हणाला,(७१) 'आपणच दिलेल्या राज्यात आसक्त होऊन मी आपले चरण विसरून की हो गेलो!' 'असं का? मग सांग बरे मी कोण आहे?' असा श्रीगुरूंचा प्रश्न अपेक्षून तो राजा पुढच्या तीन श्लोकांत सांगतो आहे.(७२) 'प्रभो, आपले वचन कधीच मिथ्या होत नाही! पूर्वजन्मी मी जो परीट होतो तोच आता हा सार्वभौम राजा झालो आहे. असा आपला कृपाप्रभाव आहे! महाराज, माझ्या अपराधांची क्षमा करा.'७२. 'कृष्णातीरी रमणाऱ्या श्रीपादगुरो, हात, पाय आणि मस्तक थरथरत असताना, डोळ्यांतून हर्षाश्रू गाळीत आपल्यासमोर वाकलेल्या आपल्या सेवकाचे रक्षण करा!' सर्वांगाचा कंप आणि सात्त्विक भावांचा उद्रेक यातून राजावर शक्तिपात झाल्याचे संकेत मिळतात.७३. 'हरे, या स्फोटकाच्या दुखण्याच्या निमित्ताने आज आपले दर्शन झाले आणि माझी हरवलेली जाणीवही आत्ता एका क्षणात परतली!'७४.

**स्फोटकं दर्शय क्वास्त इत्युक्तो गुरुणा स तु । सन्तं स्फोटकमप्यङ्के न दृष्ट्वा चकितोऽब्रवीत् ।।७५।।**
**स्वामिन्मन्येऽनुगोऽयं ते स्फोटकोऽनयवर्तिनम् । आनीय दण्ड्यमन्यत्र कृतकार्यो ययौ खलु ।।७६।।**
**तव जाग्रत्सु वाक्येषु दुःखदोषपरिप्लुते । असारे सति संसारे मग्नं माज्ञं समुद्धर ।।७७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**तृप्तं तेऽपि मनो भोगैर् भुक्तं राज्यमपीप्सितम् । लब्धाः पुत्रादयो वापि का वापेक्षास्ति ते वद ।।७८।।**

गुरुणा, 'स्फोटकं क्व अस्ति, दर्शय!' इति उक्तः सः तु अङ्के सन्तं स्फोटकं अपि न दृष्ट्वा चकितः अब्रवीत्।७५। '(हे) स्वामिन्, अयं स्फोटकः ते अनुगः मन्ये। अनय+वर्तिनं दण्ड्यं (मां) आनीय कृत+कार्यः अन्यत्र ययौ खलु।७७। तव जाग्रत्सु वाक्येषु दुःख+दोष+परिप्लुते असारे संसारे मग्नं मां अज्ञं समुद्धर।'७७। श्रीगुरुः उवाच। 'ते मनं भोगैः तृप्तम्? अभीप्सितं राज्यं अपि भुक्तम्? पुत्र+आदयः अपि लब्धाः वा? का वा अपेक्षा अस्ति? वद।'७८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुला स्फोटक झाला आहे का? दाखव पाहू कुठे आहे?' तेव्हा राजाने पाहिले मांडीवर असलेला तो फोड नाहीसाच झाला आहे! तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.७५. 'स्वामिमहाराज, हा स्फोटक तुमचाच दूत असावा. अन्यायाने वागणाऱ्या, शिक्षापात्र अशा मला इथे आणून, आपले काम होताच इतरत्र निघून गेला वाटते!'७६. 'महाराज, पूर्वजन्मी आपल्या जाग्रत वचनांचा उपदेश असूनही मी या दुःखदोषांनी बरबटलेल्या सारहीन संसारात निमग्न झालो आहे. आपणच माझा यातून उद्धार करा.'७७. श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुझे मन भोगांनी तृप्त झाले का? तुला ज्याची तीव्र कामना होती ते राज्य भोगून झाले ना? पुत्रादि सर्व लाभले ना? का आणखी कांही अपेक्षा आहे, मला सांग.'७८.

**स प्राह परिपूर्णं मे सर्वं ते कृपयेश्वर । त्वद्दत्ताप्यखिला ते श्रीरर्पणीयेत्यपेक्षितम् ।।७९।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यतेर्मे गमनं म्लेच्छ गोघ्ने राज्ये कथं भवेत् । मां वर्णास्त्वामपि म्लेच्छ हसिष्यन्ति न संशयः ।।८०।।**

**।। राजोवाच ।।**

**रजकोऽहं भवान्छ्रीपान् न हिंसातःपरं पुरे । इत्युक्त्वा लोलदङ्गस्तं नेतुकामोऽस्तुवद्विभुम् ।।८१।।**

सः प्राह, '(हे) ईश्वर, ते कृपया मे सर्वं परिपूर्णम्। त्वत्+दत्ता अखिला श्रीः अर्पणीया इति अपेक्षितम्।'७९। श्रीगुरुः उवाच। 'रे म्लेच्छ, मे यतेः गो+घ्ने राज्ये गमनं कथं भवेत्? मां वर्णाः त्वां अपि म्लेच्छाः हसिष्यन्ति न संशयः।'८०। राजा उवाच। 'अहं रजकः, भवान् श्रीपादः। अतःपरं पुरे हिंसा न।' इति उक्त्वा लोलत्+अङ्गः तं नेतु+कामः विभुं अस्तुवत्।८१।

तो यवन राजा उत्तरला, 'महाराज, आपल्या कृपेने माझे सर्व कांही परिपूर्ण झाले आहे. आता आपण दिलेले हे सर्व ऐश्वर्य आपल्याला समर्पित करावे हीच एक इच्छा आहे!'७९. श्रीगुरू म्हणाले, 'अरे यवना, माझ्यासारख्या संन्याशाला, जिथे नित्य गोहत्या होते त्या राज्यात कसे बरे जाता येईल? मला वर्णाश्रमधर्माचे लोक (हिंदू), आणि तुलाही सगळे मुसलमान निःसंशय हसतील की!' इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी '**गो** म्हणजे वेदांची विधिवचने (आज्ञा) यांची हत्या म्हणजे नास्तिक्याने अवज्ञा होते अशा तुझ्या राज्यात मी संन्यासी कसा येऊ?' असा पर्यायी अर्थ दिला आहे.८०. राजा म्हणाला, 'मी जरी सांप्रत जातीने मुसलमान असलो तरी पूर्वजन्माची स्मृती आल्याने आपण श्रीपादस्वामी आहात आणि मी आपला सेवक रजक आहे. याउप्पर माझ्या नगरीत गोहिंसा होणार नाही.' असे बोलून कापऱ्या शरीराने श्रीप्रभूंना आपल्या राज्याला नेण्याच्या इच्छेने तो त्यांची स्तुती करू लागला.८१.

**स प्राह तुष्ट आयास्ये भक्ताधीनोऽस्मि केवलम् । हेतुनानेन नोपेक्ष्या मद्भक्ता मद्गतान्तराः ।।८२।।**
**स तच्छ्रुत्वोपवेश्येशं प्रतीतः स्वासने नृपः । वाहान्दत्वापि शिष्येभ्यो धृततत्पादुकोऽन्वगात् ।।८३।।**
**प्राहाङ्घ्रिचारिणं स्वामी तं तदारादितो नृप । गन्तव्यमस्त्यपीदं तु न श्लाघ्यं सार्वभौम ते ।।८४।।**
**स प्राह सार्वभौमः को रजकस्तेऽनुगोऽस्म्यहम् । त्वयैव न्यस्तभूधूस्त आज्ञयानुचराम्यहम् ।।८५।।**

तुष्टः सः प्राह, 'आयास्ये। केवलं भक्त+अधीनः अस्मि। अनेन हेतुना मत्+गत+अन्तराः मत्+भक्ताः न उपेक्ष्याः।'८२। सः प्रतीतः नृपः तत् श्रुत्वा ईशं स्व+आसने उपवेश्य, शिष्येभ्यः अपि वाहान् दत्वा धृत+तत्+पादुकः अन्वगात्।८३। तत् तं अङ्घ्रि+चारिणं स्वामी प्राह, 'इतः आरात् गन्तव्यं अस्ति। (हे) सार्वभौम, इदं अपि तु ते न श्लाघ्यम्।'८४। सः प्राह, 'कः सार्वभौमः? अहं ते अनुगः रजकः अस्मि। त्वया एव न्यस्त+भू+धूः अहं ते आज्ञया चरामि।'८५।

त्याने प्रसन्न होऊन श्रीपाद त्याला म्हणाले, 'बरे तर, येतो मी! मी केवळ भक्तपराधीन आहे. त्याकरिता ज्यांनी आपल्या चित्तांत मला धरून ठेवले आहे अशा माझ्या भक्तांची उपेक्षा करू नये.'८२. राजाला आनंद वाटला. त्याने लगेच श्रीगुरूंना आपल्या पालखीत बसविले, त्यांच्या शिष्यांनाही वाहने दिली आपण श्रीगुरूंच्या पादुका हातात घेऊन तो पायीच त्यांच्या मागे निघाला.८३. त्याला तसे पायी चालतांना पाहून स्वामी म्हणाले, 'आपल्याला इथून बरेच दूर जायचे आहे. तुझ्यासारख्या सार्वभौम राजाला हे असे पायी चालणे शोभत नाही.' ८४. तो राजा म्हणाला, 'कोण सार्वभौम राजा? महाराज! मी तर आपला दास रजक आहे. आपणच माझ्या खांद्यावर दिलेली हा राज्याची धुरा मी वाहतो आहे आणि आपल्याच आज्ञेत राहतो आहे.'८५.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**दत्तं ते दिक्पमात्राभी राट्त्वं तेनासि विष्णुवत् । राजन्ममाज्ञयैवाश्वमारुह्य व्रज मा वद ।।८६।।**
**ततः सोऽप्यारुरोहाश्वं तमाह भगवान्नृप । गत्यानया क्रियालोपो भवेदग्रे व्रजाम्यतः ।।८७।।**
**एहि मन्दं पापनाश-तीर्थे तिष्ठामि भूपते । इत्युक्त्वार्धक्षणात् पङ्क्ति-योजनायतमापतत् ।।८८।।**
**सशिष्यः स तु तत्तीर्थे सान्ध्यं कर्माकरोत्तदा । सायंदेवसुतो नाग-नाथो गच्छन् ददर्श तम् ।।८९।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) राजन्, ते दिक्+प+मात्राभिः राट्+त्वं दत्तम्। तेन (त्वं) विष्णु+वत् असि। मम आज्ञया एव अश्वं आरुह्य व्रज। मा वद।'८६। ततः सः अपि अश्वं आरुरोह। भगवान् तं आह, 'अनया गत्या क्रिया+लोपः भवेत्। अतः अग्रे व्रजामि।'८७। 'भूपते, मन्दं एहि। पापनाश+तीर्थे तिष्ठामि।' इति उक्त्वा अर्ध+क्षणात् पंक्ति+योजन+आयतं आपतत्।८८। तत् सः तु सशिष्यः सांध्यं कर्मं अकरोत्। तदा सायंदेव+सुतः नागनाथः गच्छन् तं ददर्श।८९।

**हीन यातीचा राजाही आदरणीय.** श्रीगुरु त्याला म्हणाले, 'अरे राजा, मी तुला दिक्पालांच्या अंशापासून राजेपण दिलेले आहे. त्यामुळे तू विष्णुसमान आहेस. तरी माझी आज्ञा म्हणूनच तू आता कांही न बोलता घोड्यावर स्वार हो.' ह्यातून असे सूचित केले आहे की युगमानाने जरी राजा हीन जातीचा असला तरी त्याचा आदर केला पाहिजे आणि त्याच्या शासनाचे अतिक्रमण करू नये.८६. मग तो राजाही घोड्यावर बसला. त्याला श्रीगुरू भगवान् म्हणाले, 'ह्या मंद गतीने गेल्यास माझ्या नित्यकर्माचा लोप होईल. त्यासाठी मी पुढे जातो.'८७. 'आणि राजा, तू सावकाश ये. मी पापनाशतीर्थावर थांबतो.' एवढे बोलून श्रीगुरू क्षणार्धांत दहा योजन (४० कोस किंवा १०० मैल) दूर बिदरजवळील पापनाश तीर्थाला पोचले (गाणगापूरहून बिदर ११० कि.मी. आहे).८८. तिथे श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांसह संध्याकाळचे कर्म केले. तेवढ्यात सायंदेवाचा वडील मुलगा नागनाथाने तिथे येऊन श्रीगुरूंचे दर्शन घेतले.८९.

**चकोरश्चन्द्रमिव तं दृष्ट्वा हृष्टः स्वदैवतम् । संप्रार्थ्य स्वगृहं नीत्वा भोजयामास सादरम् ।।९०।।**
**सशिष्यस्तद्गृहे भुक्त्वा तमाहैष्यति राडिह । स तु म्लेच्छो न साध्वेतत्तीर्थे स्थेयमतो द्विज ।।९१।।**
**इत्युक्त्वा स ययौ तीर्थं स राजाप्याययौ तदा । प्रतीतः पादचारी स निन्ये निजपुरं गुरुम् ।।९२।।**
**अलङ्कृतं शुभं नाना-रत्नतोरणमण्डितम् । पताकाध्वजसङ्कीर्णं पुरं भास्वत्सुशोभनम् ।।९३।।**
**गीतवाद्यजयध्वान-सङ्कुलं शिष्ययुग्गुरुः । नीराजितो रत्नदीपैः पालकस्थो विवेश सः ।।९४।।**

तं स्व+दैवतं चकोरः चन्द्रं इव दृष्ट्वा हृष्टः संप्रार्थ्य स्व+गृहं नीत्वा सादरं भोजयामास।९०। (श्रीगुरुः) सशिष्यः तत्+गृहे भुक्त्वा तं आह, 'राट् इह एष्यति। स तु म्लेच्छः। न एतत् साधु। अतः (हे) द्विज, तीर्थे स्थेयम्।'९१। इति उक्त्वा सः तीर्थं ययौ। तदा सः राजा अपि आययौ। सः प्रतीतः पादचारी गुरुं निज+पुरं निन्ये।९२। अलङ्कृतं शुभं नाना+रत्न+तोरण+मण्डितं पताका+ध्वज+सङ्कीर्णं सुशोभनं भास्वत् गीत+वाद्य+जय+ध्वान+सङ्कुल सः पालक+स्थः शिष्ययुक् गुरुः पुरं रत्न+दीपैः नीराजितं विवेश।९३-९४।

आपले दैवतच असलेल्या श्रीगुरूंना पाहून चकोराला चंद्रदर्शनाने व्हावा तसा आनंद त्याला झाला. या दृष्टांताने त्याला गुरुदर्शनाची किती ओढ होती ते दाखविले आहे. त्याने आग्रहाची प्रार्थना करून सर्वांना आपल्या घरी नेऊन आदरपूर्वक भोजन दिले.९०. शिष्यांसह नागनाथाच्या घरी भोजन घेतल्यावर श्रीगुरू त्याला म्हणाले, 'भटजी, आता थोड्याच वेळात राजा इथे येईल. तो तर तुला मुसलमान आहे. ते कांही बरे नाही. तरी आम्ही तीर्थावरच थांबतो.'९१. असे म्हणून ते तीर्थाला गेले. तितक्यात राजाही येऊन पोचला. श्रीगुरूंना पाहून त्याला आनंद झाला. स्वतः पायी चालत त्याने श्रीगुरूंना पालखीत बसवून आपल्या नगरीत नेले.९२. संपूर्ण शहर नाना रत्नांची तोरणे, पताका, ध्वज, यांनी शृंगारले होते. त्या सुशोभित, सुप्रकाशित आणि शुभालंकृत शहरात गीत, वाद्य आणि जयजयकारच्या गजरात, पालखीत बसून श्रीगुरूंनी शिष्यांसह प्रवेश केला. त्या वेळी त्यांना रत्नदीपांनी ओवाळण्यांत आले.९३-९४.

**पट्टकूलच्छत्रसृत्या नीत्वान्तःपुरमीश्वरम् । भद्रासने तूपवेश्य पूजयामास तं नृपः ।।९५।।**
**शिष्यान् यथास्वपीठस्थान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः । पुत्रान्पौत्रान्सखीन्स्वांश्च दर्शयामास शंभवे ।।९६।।**
**गीतं सवाद्यं नृत्यं च छत्रचामरमालिने । तस्मै समर्प्य प्रकृतीर् दर्शयामास सर्वशः ।।९७।।**
**म्लेच्छा विरुद्धचेष्टं धिक्-चक्रुर्भूपं द्विजार्चकम् । प्रशशंसुर्द्विजा राजा पुण्यश्लोकोऽयमित्यपि ।।९८।।**
**गुरुस्तमाह हृष्टोऽस्मि दृष्ट्वा ते प्रकृतीः शुभाः । तुष्टोऽस्याभिर्न वा ब्रूहि निःशङ्कं निकटं मम ।।९९।।**

पट्टकूल+छन्न+सृत्या अन्तःपुरं नीत्वा तु भद्र+आसने उपविश्य नृपः तं पूजयामास।९५। यथा+स्वपीठान् शिष्यान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः पुत्रान् पौत्रान् सखीन् स्वां च शंभवे दर्शयामास।९६। सवाद्यं गीतं नृत्यं च छत्र+चामर+मालिने तस्मै सर्वशः प्रकृतीः समर्प्य दर्शयामास।९७। म्लेच्छा विरुद्ध+चेष्टं द्विज+अर्चकं भूपं धिक् चक्रुः। द्विजाः 'अयं राजा पुण्य+श्लोकः' इति अपि प्रशशंसुः।९८। गुरुः तं आह, 'अस्याभिः तुष्टः असि? न वा? मम निकटं निःशंकं ब्रूहि।'९९।

राजाने त्यांना गालिच्यांनी मढवलेल्या मार्गाने अंतःपुरांत नेऊन सिंहासनावर बसवून राजोपचारांनी सत्कार केला.९५. शिष्यांनाही आपापल्या योग्यतेप्रमाणे आसने देऊन त्यांची उत्तम प्रकारे पूजा केली. मग राजाने आपल्या पट्टराण्या, इतर स्त्रिया, मुले, नातवंडे, मित्र, मैत्रिणी, स्वजन सर्वांना श्रीगुरूंना भेटविले.९६. श्रीगुरूंवर छत्र धरून व त्यांच्यावर चवऱ्या ढाळत त्यांना आपल्या सर्व मंत्री, सुहृद, कोश, सैन्य सन्माननीय पौर इत्यादि सर्व प्रकृती (वैभव) दाखविल्या. (*स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च। सेनाङ्गानि प्रकृतयः पौराणां श्रेणयोऽपि च।।* अमरकोश २:८:१७-१८).९७. त्या वेळी मुसलमान लोक ह्या ब्राह्मणांची पूजा करणाऱ्या धर्माविरुद्ध वागणाऱ्या राजाचा धिक्कार करू लागले. ब्राह्मण मात्र 'हा राजा पुण्यश्लोक आहे!' अशी त्याची भलाई करू लागले.९८.

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'या सगळ्या वैभवाने तू संतुष्ट आहेस ना? की नाहीस? मला निःशंकपणे सांग.'९९.

**स प्राहाभिर्न तुष्टोऽस्मि साम्राज्यं तेऽङ्घ्रिसंस्थितम् ।श्रुत्वा तत्परमं काङ्क्षे दुरापमपि देहि मे ।।१००।।**
**अद्यैव भवते कुर्वे सर्वस्वात्मनिवेदनम् । इत्युक्त्वा स तथा चक्रे राट् सङ्कल्पपुरःसरम् ।।१०१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कृतं साधु त्वया भूप तुष्टोऽनेन ददामि ते । मन्मनस्काय भक्ताय शुद्धभावाय काङ्क्षितम् ।।१०२।।**

सः प्राह, 'न तुष्टः अस्मि। ते अङ्घ्रि+संस्थितं साम्राज्यं श्रुत्वा तत् परमं काङ्क्षे। दुरापं अपि मे देहि।'१००। 'अद्य एव भवते सर्वस्व+आत्म+निवेदनं कुर्वे।' इति उक्त्वा राट् सङ्कल्प+पुरःसरं तथा चक्रे।१०१। श्रीगुरुः उवाच। '(हे) भूप, त्वया साधु कृतम्। अनेन तुष्टः मत्+मनस्काय भक्ताय शुद्ध+भावाय ते कांक्षितं ददामि।१०२।'

तेव्हा तो राजा उत्तरला, 'नाही महाराज! मी याने समाधानी नाही. आपल्या चरणसेवारूप साम्राज्याची मला आस आहे. कितीही दुष्प्राप्य असेल तरी ते मला द्या!'१००. 'सर्वस्वाचे आणि आपले समर्पण केल्यावाचून आपली चरणसेवा दुर्लभ असेल तर आजच मी माझे राज्यादि सर्वस्व आणि हा देह या सर्वांचे निवेदन करतो.' असे बोलून राजाने '*अनेन विश्वात्मा प्रसीदतु*' असा संकल्प करून मनःपूर्वक सर्वस्वात्मनिवेदन केले.१०१.

**भक्ताची जातपात पाहू नये.** श्रीगुरू म्हणाले, 'राजा, तूं हे मोठे सत्कार्य केलेस! ह्या आत्मसमर्पणाने माझ्या सर्वात्मकाच्या ठिकाणी तुझी वृत्ती अनन्य झाली आहे. आता तुला तुझी वांछित चरणसेवा देतो!' नीच यातीच्या मुसलमानाला कशी चरणसेवा दिली? या प्रश्नाचे उत्तर **'शुद्धभावाय भक्ताय'** या विशेषणात आहे. रागादि मल चित्तांतून गेल्याने त्या राजाचा (स्व)भाव शुद्ध झाला होता. '*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्*'।।९:३२।। या गीतावचनानुसार भगवंताच्या भक्तांसाठी वर्णादींचे प्रयोजन नाही. भक्तीच्या उत्पत्तीसाठी आपल्या वर्णाश्रमानुसार विहित कर्माचे अनुष्ठान करून चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. पण पूर्वजन्माच्या कांही संस्कारांनी जागलेल्या भक्तीचा कोणाला नाश करता येईल? तो राजा यवन असला तरी त्याच्या पूर्वसंस्कारांनी त्याच्या चित्तात भक्तीचा उदय झाला आहे. त्याच्या जातपातीमुळे तिला बाध येऊ शकत नाही. म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपली चरणसेवा दिली यावर कांहीही आक्षेप घेता येत नाही.१०२.

**इत्युक्त्वा श्रीगुरुर्यूने भूधुरं पार्थिवार्पिताम् । ज्येष्ठायादाद्विनीताय तदौरससुताय सः ।।१०३।।**
**भूपं प्राह गुरुः शीघ्रं प्रव्रजाहमितो द्रुतम् । गत्वा मठं समाश्वास्य शिष्यान्भक्तानपीतरान् ।।१०४।।**
**श्रीपर्वतं गमिष्यामि त्वमप्येहि नगोत्तमे । भवेन्मे दर्शनं तत्र जीवन्मुक्तो भविष्यसि ।।१०५।।**
**इत्युक्त्वा गौतमीं गत्वा स्नात्वा शिष्यान्वितः प्रभुः । संप्राप्तोऽमरजाभीमा-सङ्गमं योगिजीवनः ।।१०६।।**

इति उक्त्वा सः श्रीगुरुः पार्थिव+अर्पितं भूधुरं यूने, ज्येष्ठाय विनीताय तत्+औरस+सुताय अदात्।१०३। गुरुः भूपं प्राह, 'शीघ्रं प्रव्रज। अहं इतः द्रुतं मठं गत्वा, शिष्यान्, भक्तान् इतरान् अपि समाश्वास्य।१०४। श्रीपर्वतं गमिष्यामि। त्वं अपि नग+उत्तमे एहि। तत्र मे दर्शनं भवेत्। (त्वं) जीवन्+मुक्तः भविष्यसि।१०५।' इति उक्त्वा शिष्य+अन्वितः योगिजीवनः प्रभुः गौतमीं गत्वा स्नात्वा अमरजा+भीमा+सङ्गमं संप्राप्तः।१०६।

असे त्या राजाशी बोलून श्रीगुरूंनी त्याने अर्पण केलेली राज्यधुरा कामंदकाच्या वचनानुसार (*विनीतमौरसं पुत्रं यौवराज्येऽभिषेचयेत्।* २:६-७) त्याच्या तरुण, ज्येष्ठ, विनयशील औरस पुत्राला दिली.१०३. पुनः त्यांनी राजाला सांगितले, 'तू आता लवकर सगळी अहंता आणि ममता सोडून इथून - ह्या तुझ्या राज्यांतून, बाहेर पड. मीहि आता लगेच गाणगापुरच्या मठाला जाऊन तिथे सर्व शिष्याचे, भक्तांचे आणि इतरांचेही समाधान करून(१०४) श्रीशैल्याला जाणार आहे. तूही त्या पवित्र पर्वतावर ये. तिथे आपली भेट होईल आणि तू कृतार्थ होशील.'१०५.

याप्रमाणे त्या बादशहाशी बोलून शिष्यपरिवारासहित श्रीगुरूंनी गोदावरी नदीला जाऊन तिथे सिंहस्थ पर्वणीचे स्नान केले. आणि परत अमरजा-भीमा संगमावर आले.१०६. तेथील सर्व लोकांना आनंद झाला. त्यांनी श्रीगुरूंची पूजा करून त्यांच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मणभोजने केली.१०७.

**तत्रत्या अपि तं दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे तदा । नीराज्य श्रीगुरुं चक्रुस् तदर्थं ब्रह्मभोजनम् ।।१०७।।**
**सर्वत्र प्रसृता भक्तिर् म्लेच्छा अपि भजन्त्यतः । कलौ घोरेऽत्र न स्थेयं साक्षादेवेत्यमंस्त सः ।।१०८।।**
**श्रीशैलमुक्तवद्गत्वा म्लेच्छायापि स सद्गतिम् । सर्वस्वात्मार्पणाद्दत्वा पुनः प्रापाव्ययो मठम् ।।१०९।।**
**तस्थौ भजत्कामधेनुः प्रत्यक्षस्तत्र वै सताम् । अगोचरस्त्वनार्याणां जन्मान्धानामिवोष्णगुः ।।११०।।**

तत्रत्या सर्वे अपि तदा तं दृष्ट्वा जल्हादिरे। श्रीगुरुं नीराज्य तत्+अर्थं ब्रह्म+भोजनं चक्रुः।१०७। 'भक्तिः सर्वत्र प्रसृता, म्लेच्छा अपि भजन्ति। अतः अत्र घोरे कलौ साक्षात् न स्थेयम्।' इति सः अमंस्त।१०८। उक्त+वत् सः श्रीशैलं गत्वा म्लेच्छाय अपि सर्वस्व+अर्पणात् सत्+गतिं दत्वा पुनः अव्ययः मठं प्राप(१०९) तस्थौ। भजत्+काम+धेनुः तत्र सतां वै प्रत्यक्षः। अन+आर्याणां तु जन्म+अन्धानां उष्णगुः इव अगोचरः।११०।

'आपल्या भक्तीचा आता सगळीकडे प्रसार झाला आहे. त्यामुळे मुसलमानही आपल्याला भजतील. म्हणून या घोर कलियुगात आपण साक्षात् - दृश्यमान स्वरूपात, राहू नये' असा प्रभूंनी विचार केला.१०८. मग बादशहाला सांगितल्याप्रमाणे ते श्रीशैल्य पर्वताला गेले. त्या यवन राजाच्या सर्वस्वासहित आत्मसमर्पणाच्या फलस्वरूप त्याला उत्तम गती दिली आणि ते अविनाशी प्रभू मठात येऊन तिथेच राहिले. इथे **अपि** शब्दातून हे सुचविले आहे की इतरही भक्तांना ते सद्गती देतातच.१०९. भक्तांची कामधेनूच असलेले, नित्य भक्तांच्या कामना पुरविणारे श्रीगुरू आजही भक्तांना प्रत्यक्षच आहेत. अनार्यांना - नास्तिकांना, अभक्तांना, निंदकांना, तपहीनांना मात्र ते, जन्मांधाला जसा सूर्य, तसे अगोचर आहेत.११०.

**कृष्णापञ्चनदीयोगे प्रातः स्नात्वात्र सङ्गमे । कर्म कृत्वाह्निकं भिक्षां मठे भुक्त्वैव तिष्ठति ।।१११।।**
**दर्शिता विविधा लीला दर्शयत्यप्यनन्तशः । दर्शयिष्यति को वेत्ति प्रभावं तस्य दुर्ग्रहम् ।।११२।।**
**यो यो यस्य तु कामस्तद्भजनात्सिद्धिमेत्यरम् । भजतोऽनुभजत्येष यतोऽसौ भक्तिभावनः ।।११३।।**
**जागरूका कलौ प्रायः काचिन्न भगवत्कला । तत्साक्षाद्भगवन्तं तं श्रद्धयाऽसंशयं भज ।।११४।।**
**इति सिद्धोदितं श्रुत्वा श्रद्धयाऽसंशयं गुरुम् । अभ्यर्च्याऽऽपामृतं द्राक् तच्छ्रवणान्नामधारकः ।।११५।।**

(श्रीगुरुः) प्रातः कृष्णा+पञ्चनदी+योगे स्नात्वा सङ्गमे आह्निकं कर्म कृत्वा मठे भुक्त्वा (तत्र) एव तिष्ठति।१११। विविधा लीला दर्शिता, अनन्तशः दर्शयति, दर्शयिष्यति अपि। तस्य दुर्ग्रहं प्रभावं कः वेत्ति?११२। यः यः यस्य कामः तत्+भजनात् अरं सिद्धिं एति, यतः एष असौ भक्ति+भावनः भजतः अनुभजति।११३। 'कलौ प्रायः काचित् भगवत्+कला न जागरूका। तत् तं साक्षात् भगवन्तं श्रद्धया असंशयं भज।'११४। इति सिद्ध+उदितं श्रुत्वा नामधारकः गुरुं असंशयं अभ्यर्च्य तत्+श्रवणात् द्राक् अमृतं आप।११५।

आजही श्रीगुरू प्रातःकाळी नरसोबाच्या वाडीला कृष्णा-पंचगंगा संगमावर स्नान करून इथे भीमामरजा संगमावर आह्निक करून मठात भिक्षा (भोजन) करून तिथेच राहतात.१११. आजवर त्यांनी कित्येक लीला दाखविल्या आहेत, अगणित लीला आजही दाखवीत आहेत आहेत, भविष्यातही अशाच दाखविणार आहेत. त्यांचा अगम्य प्रभाव कुणी जाणला आहे?११२. इथे सेवा करणाऱ्यांच्या ज्या ज्या कामना असतील त्या त्या इथे तत्काल संपूर्ण होतात; कारण हे भक्तीला भाळणारे प्रभू भजणाऱ्यावर अनुग्रह करातात.११३. 'या कलियुगांत भगवंताच्या विभूतिरूप बहुतेक देवता निद्रित असतात; यासाठी या साक्षात् भगवंताची - श्रीगुरूंची, श्रद्धेने, सर्व संशय टाकून भक्ती कर.'११४. हे सिद्धमुनींचे वचन मानून नामधारकाने संशयरहित होऊन उपासना केली आणि त्या सद्गुरूंच्या गुणश्रवणाने तो लवकरच मोक्ष पावला.११५.

**तत्संवादमयं ग्रन्थं धर्म्यं गङ्गाधरात्मजः । सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत्तारकं सुधीः ॥११६॥**
**यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूत-रक्षोमुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः ।**
**सप्ताहं तत्पाठिने शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति ॥११७॥**
**स एवात्रेयगोत्रोत्थ-गणेशब्रह्मपुत्रगाम् । पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रन्थात्मा तारकोऽव्ययः ॥११८॥**

सुधीः गङ्गाधर+आत्मजः तत्+संवाद+मयं धर्म्यं तारकं सत् श्रीगुरुचरित्र+आख्यं ग्रंथं व्यरचत्।११६। एषः यत्र क्व अपि स्थापितः प्रेत+भूत+मुख्य+असत्+ग्रह+आर्तिघ्नः। सप्त+अहं तत् पाठिने शृण्वते अपि दत्तात्रेयः अभीष्ट कामान् ददाति।११७। सः एव अर्थ्यः तारकः अव्ययः ग्रन्थ+आत्मा आत्रेय+गोत्र+उत्थ+गणेश+पुत्र+गां पुनानः अत्र जयति।११८।

त्यांच्या - सिद्ध आणि नामधारक यांच्या, संवादरूप ओवीबद्ध श्रीगुरुचरित्र नावाचा धर्मप्रद ग्रंथ गंगाधरपुत्र सरस्वती यांनी मराठीत रचलेला आहे.११६. हा ग्रंथ जिथे कुठे केवळ ठेवलेलाही असला तरी भूत, प्रेत आदि दुष्ट ग्रहांची पीडा दूर होते. ह्या ग्रंथाचे सात दिवसांचे पठण अथवा श्रवण करणाऱ्याच्या अभीष्ट कामना श्रीदत्तप्रभू पूर्ण करतात.११७. तोच तारक, अविनाशी, पुरुषार्थप्रद ग्रंथस्वरूपी दत्तात्रेय आत्रेय गोत्रोत्पन्न ब्राह्मण गणेशाचा पुत्र वासुदेव याच्या वाणीला पावन करीत इथेही भक्तोद्धाररूपी विजय मिळवीत आहे.११८.

हा अंतिम श्लोक मंगलाचरणात्मक आहे. टीकेमध्ये श्रीस्वामिमहाराजांनी आपल्या अलौकिक प्रतिभेने याचे विविध प्रकारे विवरण केले आहे.

**१. ॐकारपर (ब्रह्मपर) -** कठ उपनिषदानुसार (१:२:१५-१७) 'सर्व वेदांनी प्रतिपादलेले, सर्व तपस्यांत पुरस्कारलेले, ज्याच्या प्राप्तीसाठी साधक ब्रह्मचर्य धारण करतात' अशा शब्दांत सर्व उपासकांसाठी सर्वश्रेष्ठ प्रतीक आणि आलंबन म्हणून **ॐ**काराचे प्रतिपादन केले आहे.

**ॐ नमो भगवन्विश्व-हेतो ब्रह्मेडिताज ते । मालीनो विश्वभृल्लीलाविहार्यस्यार्यभावनः ।।११९।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे पञ्चमोऽध्यायः । आदितस्त्रयोविंशोऽध्यायः ।।२३।।**

ॐ भगवन् विश्व+हेतो, ब्रह्म+ईडित, अज, ते नमः। मालीनः विश्वभृत् लीला+विहारी आर्य+भावनः असि।११९।

तसेच ते ब्रह्माचे नाम असल्याने आणि नाम आणि नामी यांचा अभेद लोकप्रसिद्ध असल्याने; वस्तुतः ॐकार हा ब्रह्माचाच विवर्त असल्याने ते आपल्या अधिष्ठानाहून वेगळे नाही; ते ब्रह्माचे नावच असल्याने '*ब्रह्मदृष्टिरुकर्षत्वात्*' या न्यायाने ब्रह्म म्हणून उपास्य आहे. **ॐ** आपल्या उपासकांचे अविद्यादि अनर्थबीजांपासून रक्षण करते. '*ॐ इति ब्रह्म*' (तैत्तिरीय उ. १:८:१) 'हेच एक अक्षर ब्रह्म' (कठ उ. ८:२:१६) 'हेच खरोखर पर तसेच अपर ब्रह्म आहे' (प्रश्न उ. ५:२) श्रुतिवचनांनुसार त्या ब्रह्माचे संबोधन 'हे **ॐ**'. **भगवन् -** वेदांच्या पठणात प्रथम उच्चारले जाणारे पूजनीय अक्षर म्हणून त्याला भगवन् असे संबोधन केले आहे. जगद्रूपी पर्णशंकु (छां.उ. २:२३:३) ज्याच्या देठाच्या आश्रयाने स्थिर आहे त्या ब्रह्माशी तादात्म्य पावलेले नामधेय *ॐकार* हाच **विश्वहेतु**, जगताचे आदिकारण आहे. **ब्रह्म**णा म्हणजे वेदाने '*ॐमित्येकाक्षरम्*' अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मेडित**. अकार हा सर्व वाचांचे मूळ असून सर्व व्यंजने आणि स्वर त्यांत सामावलेले आहेत (ऐतरेय आरण्यक २:३:६). त्यामुळे ॐकाराला **अज** ('अ'पासून झालेला) हे नाव सहजच आहे. किंवा **अ** म्हणजे ब्रह्मदेवाच्या कंठाला भेदून बाहेर पडलेला (अयोनिज) (बृहन्नारदीय पुराण १५११०) म्हणूनही ॐकाराला **अज** म्हणता येईल. **ते नमः** तुला नमस्कार असो. गायत्री इत्यादि जी ब्रह्मप्राप्तीची आलंबने आहेत त्यांत ॐकाराला श्रेष्ठ म्हटलेले आहे (कठ उ.१२१७; तैत्तिरीय. उ.१:४:१). सर्व आलंबनात आपल्या श्रेष्ठत्वाने शोभणारा असा **मालीनः**. अ, उ आणि म या तीन मात्रांनी स्थूल, सूक्ष्म आणि कारण या देहत्रयरूप विश्वाला पोसणारा म्हणून **विश्वभृत्**. या तीन मात्रांच्या उपासकांना पिप्पलादांनी शैब्याला सांगितल्याप्रमाणे (प्रश्न उ. ५) ऋक्, यजुः आणि साम या वेदांच्या द्वारा अनायासे लीलया त्या त्या लोकांना नेणारा तो **लीलाविहारी**. पंचीकरणाच्या

वार्तिकानुसार **आर्य** म्हणजे मुमुक्षूंना **भावयति** वाढवतो असा तो **आर्यभावन**. असा तू आहेस (**असि**).

**२. ईश्वरपर -** आपल्याला हवी असलेली वस्तू जर कुणाला मागायची असेल तर जसे आपण त्या व्यक्तीला त्याला अत्यंत आवडणाऱ्या नावाने हाक देतो तसेच ईश्वराला प्रणवाने - **ॐ**काराने साद देऊन स्तुती करतात. योगसूत्रानुसार (*तस्य वाचकः प्रणवः।* १:२७) आणि भ.गीतेनुसारही (*ॐ तत्सदिति निर्देशः ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।* १७:२३) हे देवाचे आवडते नाव आहे. '*उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम्। वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति।।*' या व्याख्येनुसार हे **भगवान्** ईश्वरा, तुला नमस्कार असो. तैत्तिरीय उपनिषदानुसार (*यतो वा इमानि भूतानिः..* ३:१) सर्व विश्वाचे आदिकारण म्हणून हे **विश्वहेतो**. जगाची सृष्टी करण्यापूर्वी ब्रह्मदेवाने ज्याची स्तुती केली तो तू **ब्रह्मोडित अजा**, तुला नमन असो (**ते नमः**). ज्याच्या ईक्षणमात्राने **मा** म्हणजे माया कार्यशील आहे; पण जो तिच्याने अस्पृष्ट - **अलीन** आहे, तो **मालीनः**. जगाच्या (*विश्व*) अध्यासाचे साक्षित्वाने भरण करतो (*भृत्*); किंवा '*फलमत उपपत्तेः।*' (ब्रह्मसूत्र ३:२:३८) या न्यायाने जगातील प्राणिमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्माचे फळ देऊन पोषण करतो असा **विश्वभृत्**. विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय या लीलांनी विहरणारा **लीलाविहारी**. '*परित्राणाय साधूनां*' या भ.गीतेतील (४:८) प्रतिज्ञेनुसार साधूंचे - आर्यांचे संरक्षण करणारा **आर्यभावन** असा तू आहेस.

**३. शिवपर -** पुष्पदंताने शिवमहिम्नस्तोत्रात (२७) '*शरणद गृणात्योमिति पदम्*', रुद्राध्यायांत '*ॐ नम*', विभूति अनुवाकांत '*नमः सोमाय*', '*नमस्ताराय*' ह्याना अनुसरून **ॐ नमः भगवन्**. भव, मृड आणि शिव या तीन रूपांनी विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय करणारा (रुद्राध्याय १६:२८), ज्याच्यापासून जग उत्पन्न होते तो *भव*, रजगुणोपाधिक स्रष्टा; *मृडयति* सुखावतो तो *मृड*, सत्त्वगुणोपाधिक पालनकर्ता; हरण करणारा *हर*, तमोगुणोपाधिक संहारकर्ता; आणि विशुद्धसत्त्वगुणोपाधिक मोक्षाचा आनंद देणारा तो *शिव*. महिम्नस्तोत्राच्या ३०व्या श्लोकात हेच प्रतिपादन आहे. **ब्रह्म** म्हणजे वेदाने '*विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमान च यत् सर्वो ह्येष रुद्रः*' (तै.आरण्यक

१०:१६:१) अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोडित**. नररुंडाची माळ घालणारा (**माली**) सर्ववंद्य - ईश्वर (**इन**) तो **मालीनः**. '*या ते रुद्र शिवा तनू।*' (शु.यजु.वा.सं. १६:२) या श्रुतीनुसार शिव तनूने विश्वाचे पोषण करणारा (दुसरी घोर रुद्र तनू) तो **विश्वभृत्**. नंदीवर बसून तंत्राच्या उपकरणांनी श्मशानांत भूतांसह लीलेने विहरणारा **लीलाविहारी**. आर्यांना - पाशुपतांना जोपासणारा तो **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**४. नारायणपर -** हे **भगवन्** नारायण! नारायणाथर्वशिर उपनिषदानुसार 'नारायणापासूनच रुद्र जन्मतो, नारायणापासूनच प्रजा उपजते'; तसेच श्वेतश्वतर उपनिषदानुसार (६:१८) 'जो आधी ब्रह्मदेवाला उत्पन्न करतो' तो **विश्वहेतू**. '*विष्णुः नः कं वीर्याणि प्रवोचम्।*' (ऋग्वेद सं. १:१५४:१) असा वेदांनी स्तवलेला **ब्रह्मोडित**; ज्याचे कारण नाही असा **अज**; तुला वंदन असो (**ते नमः**). **मा** म्हणजे लक्ष्मी तिला छातीशी धरल्याने तिच्यात लीन झालेला (**मालीन**); कच्छरूपाने विश्व धारण करणारा **विश्वभृत्**; लीलेने अवतार धारण करून भक्तांवर अनुग्रह करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्य** म्हणजे वैष्णव, त्यांचे सालोक्यादि मुक्ती देऊन संवर्धन करतो तो **आर्यभावन**.

**५. ब्रह्मदेवपर -** एकाक्षरकोशानुसार (१) अकार म्हणजे विष्णू; भ.गीतेतही (१०:३३) *अक्षराणां अकारोऽस्मि* असे म्हटले आहे. तेव्हा **अ** म्हणजे विष्णूपासून झालेला तो **अज**. ऋग्वेदाने (१०:१२१:१) '*हिरण्गर्भः समवर्तताग्रे*' असा गौरविलेला आद्य शरीरधारी म्हणून पूज्य या अर्थाने **भगवन्**. वेदानुसार (ऋग्वेद स. १०:१९०:१३) 'धात्याने पूर्वीप्रमाणेच विश्व निर्माण केले,' म्हणून **विश्वहेतो**. सर्व लोक '**ब्रह्म**' म्हणून स्तवन करतात असा **ब्रह्मोडित**. **ते नमः।** मरीच्यादि मानसपुत्र ज्याला तपादींनी शोभा आणतात (*मालंते*) असा त्यांचा स्वामी (**इन**) **मालीनः**. ऋग्वेदानुसार (१०:१२१:१) 'जो ही पृथ्वी आणि स्वर्ग धारण करतो' म्हणून **विश्वभृत्**. लीलया जगदुत्पादनाची क्रिया हाच ज्याचा विहार आहे असा **लीलाविहारी**. **आर्यांना** - समुच्चयोपासकांना बल देणारा असा **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**६. अग्निपर -** 'त्याने आपले तीन भाग केले' या श्रुतीप्रमाणे (बृहदारण्यक उ. १:२:३) तोच वायू आणि

आदित्यरूपाने राहतो म्हणून **विश्वहेतो**; '**अ**' म्हणजे विराट् देह त्याच्या मुखापसून झालेला (ऋग्वेद सं.१०:९०:१३) तो **अज**; **ते नमः** तुला नमस्कार असो. वेदात (**ब्रह्मणि**) (ऋग्वेद १:१:२) 'अग्नी पूर्वीच्या ऋषींनी स्तवलेला आहे' म्हणून **ब्रह्मोडित**. तेजस्वी असल्याने **मालीनः**. जठराग्नीच्या रूपाने विश्वांतील प्राणिमात्राचे भरणपोषण करणारा **विश्वभृत्**. देवांचा दूत होऊन जो त्याना हवि पोचविण्याची क्रिया लीलेन पार पाडीत विहरतो तो **लीलाविहारी**. ईशोपनिषदांतील प्रार्थनेनुसार धर्मनिष्ठांना (**आर्यान्**) सुपथावर नेऊन त्यांचे संवर्धन करतो (**भावयति।**).

**७. वायुपर -** 'अतति' म्हणजे व्यापतो ते आकाश म्हणजेच **अः**; त्यापासून झालेला (तैत्तिरीय उ.२:१:१) **अजः**; तुला नमस्कार असो. प्रश्नोपनिषदात प्राणाच्या उपाधीने वायूचे विश्वहेतुत्व प्रतिपादलेले आहे. '*प्राणो ब्रह्मेति व्यजानात्*' या वचनाने तैत्तिरीय उपनिषदांत (३:३) शोभून दिसणारा **माली**; '*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्*' (बृहदारण्यक उ. ३:७:२) यानुसार इंद्रियांचा प्रवर्तक आणि बलवान् असल्याने राजा (**इनः**); वृत्तींच्या द्वारा विश्वाचा पोषक (**विश्वभृत्**); प्राणोपासक **आर्यां**चे संवर्धन करणारा (**भावयति।**).

**८. सूर्यपर -** पुरुषसूक्तांत विराट पुरुषाच्या (**अः**) चक्षूंपासून झालेला म्हणून **अजः**; वेदत्रयीमय असल्याने **ॐ**कारस्वरूप; प्रातः माध्याह्न आणि सायं असा त्रिकाळ पूजिला जाणारा **भगवान्**; मैत्रायणी उपनिषदानुसार (६:३७) वृष्टी, अन्न आणि प्रजा या परंपरेने **विश्वहेतु**; तैत्तिरीय आरण्यकांत 'हा आदित्यच ब्रह्म आहे' अशी आणि ऋग्वेदांत (१:११५:१) सूर्याला जगताचा आणि त्यांतील सर्व जीवांचा आत्मा अशी त्याची स्तुती केल्याने **ब्रह्मोडित**; '**मा**' म्हणजे शोभा तिने '**अलति**' व्यापतो तो **मालीनः**; ऋग्वेदानुसार (३:५९:१) 'पृथ्वी आणि स्वर्ग यांना आधार देणारा' **विश्वभृत्**; लीलया प्रकाश करीत वरचेवर भ्रमण करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्यां**ना म्हणजे गायत्रीचा जप करणाऱ्यांचा पोषक **आर्यभावन**.

**९. रामपर -** अज म्हणजे रघूचा पुत्र, त्याच्या गोत्रांत जन्मलेला **आज** म्हणजे रामचंद्रप्रभू. राक्षसांचे निर्दलन केल्याने

**विश्वहेतु**; प्रथम भूमीवर अवतरण्यासाठी व नंतर रावणवधाप्रीत्यर्थ ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**; **मा** म्हणजे माया अर्थात् सीता, तिच्यात **लीन** म्हणजे (स्त्रियांत आसक्त होण्याचे परिणाम लोकांत प्रदर्शिण्यासाठी) आसक्त तो **मालीन**. तिच्यासाठीच राक्षसांचे निर्दलन केले. धर्मस्थापनेने विश्वाचा सांभाळ केला म्हणून **विश्वभृत्**. लीलेने क्षत्रिय रूप घेऊन विहरणारा **लीलाविहारी**. बिभीषण, सुग्रीव, हनुमान अत्यादि आर्यांचासंवर्धक अर्थात् **आर्यभावन**.

**१०. कृष्णपर -** श्रीमद्भागवताच्या उक्तीप्रमाणे '*कृष्णस्तु **भगवान्** स्वयम्।*' (१:३:२८). '*अजोऽपि सन्नव्ययात्मा*' ह्या गीतोक्तीनुसार **अज**. गीतेत (९:४) त्यांनीच '*मया ततमिदं सर्वं जगत्*' असे सांगितल्याप्रमाणे **विश्वहेतु**. ब्रह्मदेवाचा गर्वपरिहार केल्यावर त्याने स्तुती केलेला **ब्रह्मोडित**. वन**माली** तर तो आहेच. **इनः** म्हणजे क्षत्रिय. दैत्यांचा निग्रह करून विश्वाचे रक्षण करणारा **विश्वभृत्**. वृंदावनांत गोपींसह व द्वारकेत सोळा हजार स्त्रियांसह विलास करणारा गोपांसह क्रीडा आणि अर्जुनाचे सारथ्य अशा **लीला** करीत **विहर**णारा. आर्य म्हणजे यादव त्यांचा रक्षणकर्ता म्हणून **आर्यभावन**.

**११. गणपतिपर -** *अजा*चा म्हणजे शिवाचा पुत्र **आजः**; अथर्वशीर्षात '*सर्वं जगदिदं त्वत्तो जायते*' असा स्तवलेला **विश्वहेतु**. निर्विघ्नतेसाठी ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**. प्रवालांच्या माळा घालणारा **माली**. विघ्नांचा **इन** (राजा). लीलेने नरगजरूपाने विहरणारा **लीलाविहारी**. गाणपत्यांचा (आर्यांचा) पोषक **आर्यभावन**.

**१२. देवीपर -** देवीच्या संदर्भांत या सर्व विशेषणांच्या स्त्रीलिंगी रूपांची योजना करावी. ***ॐ भगवती विश्वहेतुः ब्रह्मोडिता, अजा ते नमः। मालिनी विश्वभृता लीलाविहारिणी आर्यभावना असि।***

**श्रीदत्तपर -** *अज* म्हणजे ब्रह्मदेवाचा नातू **आजः**. '*ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना।।*' या व्याख्येनुसार जो संपूर्ण ऐश्वर्य, संपूर्ण धर्म, संपूर्ण यश, समग्र श्री, समग्र वैराग्य आणि समग्र मोक्ष यांनी युक्त आहे असा **भगवान्**. दत्तोपनिषदानुसार 'जो विश्वाची निर्मिती करतो आणि विश्वाचा सांभाळ

करतो' तो **विश्वहेतु** आणि **विश्वभृत्**. योगेश्वर या अर्थाने, *मा* म्हणजे *माया* तिच्यांत *अलीन* अनासक्त म्हणून **मालीन**. लीलेने अवधूतवेष घेऊन गंगास्नानादी विहार करणारा **लीलाविहारी**. भक्ताचे पालन करणारा **आर्यभावन**. तापिनी उपनिषदांत भगवान विष्णूंनी ब्रह्मदेवाला 'दत्तात्रेय नावाच्या माझ्या सात्त्विक रूपाची उपासना कर,' असे सांगितले आहे. तसेच शांडिल्याला अथर्वणाने '*शांतं आत्मप्रकाशं दत्तं ध्यायमान*' असे सांगितले आहे. त्यावरून दत्तच परब्रह्म आहेत. 'याप्रमाणे श्रीगुरूंच्या प्रेरणेने यथामती विवेचन केले.'

ग्रंथाच्या आरंभी गुरुस्तुतीच्या पहिल्या श्लोकात श्रीविष्णू, शिव, गणेश, सूर्य, शक्ती इत्यादि रूपे घेणाऱ्या सद्गुरू दत्तात्रेयाचे प्रतिपादन केले. अंती मंगलाचरणाच्या या श्लोकात बारा मुख्य देवतांची आणि दत्तप्रभूंची स्तुती एकाच श्लोकाने करून त्या सर्वांचा अभेद सिद्ध करून श्रीदत्तप्रभूच परब्रह्म आहेत हा सिद्धांत प्रस्थापित करून समारोप केला आहे. यात उपक्रम आणि उपसंहार यांची एकवाक्यता दिसून येते आणि श्रीदत्तप्रभू हेच या ग्रंथाचे तात्पर्य आहेत हे निरपवाद सिद्ध होते.

**संहितेऽयं द्विसाहस्री त्रिकांडाभीष्टदा सती। व्याख्याताऽजोऽनया प्रीयाच्छ्रीदत्तोऽयं त्र्यधीश्वराः।।**

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पाचवा आणि प्रथमपासून तेविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ योगरहस्य ।।

**श्रेष्ठपुंजन्मसाफल्यं कार्यं योगत्रयाश्रयात् । समाख्यातद्विसाहस्री-संहितासंग्रहस्त्वयम् ।।१।।**
**भक्तिं विना न साफल्यं कर्मणः कर्मणा विना । न च ज्ञानं विना ज्ञानान् न मोक्षो यस्य कस्यचित् ।।२।।**
**न ज्ञानं जीवति प्राणे मनस्यपि लयं नयेत् । यस्तौ गच्छति मोक्षं स योगी नान्यः कथंचन ।।३।।**

श्रेष्ठ+पुं+जन्म+साफल्यं योग+त्रय+आश्रयात् कार्यम्। अयं समाख्यात+द्वि+साहस्री+संहिता+संग्रहः।१। भक्तिं विना कर्मणः साफल्यं न। कर्मणा विना च ज्ञानं न। विना ज्ञानात् यस्य+कस्य+चित् मोक्षः न।२। जीवति प्राणे, मनसि अपि, ज्ञानं न। यः तौ लयं नयेत् सः योगी मोक्षं गच्छति। अन्यः कथंचन न।३।

श्रेष्ठ अशा नरजन्माचे साफल्य करावयाचे असेल तर ज्ञान, कर्म व भक्ती अशा तीनही योगांचा आश्रय करावा लागेल, हाच आतापर्यंत सांगितलेल्या द्विसाहस्री संहितेचा सारभूत अर्थ आहे. या संहितेत पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोगाचे, पुढच्या पाच अध्यायांत कर्मयोगाचे आणि अंतिम पाच अध्यायांत भक्तियोगाचे निरूपण आहे. चौदाव्या अध्यायाच्या आरंभी टीकेत ज्ञानयोगाचा अधिकार येण्यासाठी कर्मयोगाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. तसेच एकोणिसाव्या अध्यायाच्या सुरुवातीला ज्यांचे चित्त शुद्ध झाले आहे त्यांना ध्यानसिद्धीकरिता भक्तियोग सांगितला आहे. प.पू. श्रीयोगिराज गुळवणीमहाराज आपल्या योगरहस्यावरील टीकेत म्हणतात, 'याप्रमाणे वेदप्रमाणसिद्ध कर्मयोग, त्यातील न्यूनाधिकत्व दोष दूर करून त्याची पूर्णता करणारा भक्तियोग व या दोहोंचेही फल असणारा मोक्षदायक ज्ञानयोग हे तीनही योग आपल्या ठिकाणी स्थिर होण्याकरिता प्रयत्नशील राहणे हेच मनुष्य जन्माचे खरे साफल्य आहे आणि द्विसाहस्रीसहितेचा हाच सारांश आहे. असे या प्रथम लोकात श्रीमहाराजांनी सांगितले आहे.'१. भक्तीवांचून कर्माचे फळ मिळत नाही; कर्माशिवाय ज्ञान होत नाही आणि ज्ञानावाचून कुणाचाही मोक्ष होत नाही.

**चले प्राणे चलं चित्तं निश्चले निश्चलं तयोः । नष्ट एकतरे नाशो द्वयोरपि स योगतः ।।४।।**

चले प्राणे चित्तं चलम्। निश्चले निश्चलम्। तयोः एकतरे नष्टे द्वयोः अपि नाशः। सः योगतः (भवति)।४।

ज्ञानाशिवाय मोक्ष नाही हे वेदांताचा प्रमुख सिद्धांत आहे. त्याचा विचार पुढे बोधरहस्यात येणारच आहे. कर्मयोग म्हणजे वर्णाश्रमानुसार आपल्याला विहित असलेले कर्म करणे. गीतेच्या '*यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं तम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः।।१८:४६।।*' संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, '*म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे, तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आली। आकाश भूतें।।१४।।*' ज्ञानासाठी जसे कर्म आवश्यक आहे तसेच ते चित्तशुद्धीद्वारा भक्तीच्या प्रादुर्भावासाठीही आवश्यक आहे. या अभिप्रायानेच श्रीमहाराज म्हणतात की भक्तीशिवाय कर्माचे साफल्य नाही.२.

प्राण आणि मन जोवर जीवित आहेत तोवर ज्ञान होणार नाही असा सिद्धांत इथे श्रीस्वामिमहाराजांनी मांडला आहे. प्राणाचे जीवन म्हणजे इडा आणि पिंगला या नाड्यांतून (डाव्या आणि उजव्या नाकपुड्यांतून) प्राणाचे वहन. तसेच मनाचे जीवन म्हणजे संकल्प. यो दोन्हींचा जो लय करतो, या दोन्हींचा निरोध करतो तोच योगी मोक्ष पावतो. अन्य कुणीही नाही. वैद्यकशास्त्राच्या सिद्धांतानुसार श्वासोछ्वासरूपी प्राणाचे संचलन थांबणे हे मृत्यूचे लक्षण आहे. पण योगात हे मृत्यूशिवायही शक्य आहे. त्याचप्रमाणे 'आपापल्या विषयांचे ग्रहण इंद्रियांचे जीवन आहे; सतत नाना प्रकारचे संकल्प-विकल्प करून विविध वृत्ती उठवणे हे मनाचे जीवन आहे. त्यांचा निरोध इथे विवक्षित आहे. प्राण किंवा मन यांचा स्वरूपनाश नाही.' (हठयोगप्रदीपिका टीका ४:१५). योगशास्त्रानुसार ब्रह्मरंध्रात (मस्तकात) प्राणाची निश्चल स्थिती हाच प्राणाचा लय. तसेच इतर विषयांपासून निवृत्त ध्येयाकार होऊन स्थिरावणे हा मनाचा लय होय. मूर्छा किंवा झोप यांपेक्षा ही वेगळी अवस्था आहे.३.

**भक्तिक्रियाज्ञानयोगान् मुक्तिरुक्तापि तत् त्रयम् । ज्ञेयं साष्टाङ्गयोगान्तर्गतं द्वैधमतोऽत्र नो ।।५।।**

भक्ति+क्रिया+ज्ञान+ योगात् मुक्तिः उक्ता। तत् त्रयं स+अष्ट+अङ्ग+योग+अन्तः+गतम्। ततः अत्र द्वैधं नो।५।

**अष्टांगयोगांत तीनही योगांचा अंतर्भाव.** प्राण चालतो तोपर्यंत चित्तही (मन) चालते. या दोन्हींपैकी एक स्थिर झाले की दुसरेही थांबते. असे प्राण आणि मन परस्परांशी निगडित आहेत. या दोन्हींचे स्थैर्य संपादन करण्यासाठी योगाची आवश्यकता इथे महाराजांनी प्रतिपादिली आहे. हीच योगाची व्याख्याही होते. पतंजलींच्या व्याख्येतला '*चित्तवृत्तिनिरोधः*' यात समाविष्टच आहे. आत्मज्ञानासाठी म्हणजेच मोक्षासाठी योगाची आवश्यकता प्रतिपादणारी वचने वेद-शास्त्र-पुराणे यांतून प्रचुर आहेत. त्यांचा निर्देश इथे विस्तारभयाने करता येत नाही. श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणांत (२:२:१-२) सांगितल्याप्रमाणे 'सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्री-पुरुष, बाल, युवा, वृद्ध यांना योगाभ्यासाचा अधिकार आहे. आणि त्यानी अभ्यास केला तर ते सिद्धीही प्राप्त करू शकतात.'४. श्रीमद्भागवतात उद्धवगीतेत (११.२०.६) '*योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया। ज्ञानं कर्म च भक्तिश्च नान्योपायोऽस्ति कर्हिचित।।*' असे प्रतिपादन केलेले आहे. या तीन्हींपेक्षा वेगळा योगच हा मोक्षाला उपाय कसा ठरतो? या आक्षेपाच्या समाधानासाठी श्रीमहाराज सांगतात, 'हे तीनही उपाय अष्टांगयोगात अंतर्भूत आहेत. त्यामुळे इथे कांही विरोधाचा प्रश्नच येत नाही.' यापैकी योगाचे आचार्य पतंजली यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी अशी योगांची आठ अंगे सांगितली आहेत. संप्रज्ञात समाधी हा आठ अंगांपैकी शेवटचे अंग असून यांचा अंगी जो योग तो म्हणजे असंप्रज्ञात समाधी होय. त्यांपैकी **नियम** या अंगाची व्याख्या करणारे सूत्र '*शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः*।२:३२।' यांपैकी तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या तिघांचे पतंजलींनी **क्रियायोग** असे वेगळे वर्गीकरण केले आहे (२:१). उपवास, कृच्छ्र, चांद्रायणादि व्रतांनी शरीर झिजवणे म्हणजे **तप**. उपनिषत्, शतरुद्रीय, प्रणव इत्यादिकांचा जप म्हणजे स्वाध्याय आणि नवविधा भक्ती म्हणजे **ईश्वरप्रणिधान**. **स्वाध्याय** या नियमात मोक्षाच्या साधनांचा अभ्यास समाविष्ट आहे. हेच ज्ञानयोगातील श्रवण आणि मनन होत. ज्ञानयोगाचा

**नात्यश्नतोऽनश्नतोऽति-सुप्तस्यैष न जाग्रतः । युक्तचेष्टाहारनिद्रा-गतेर्योगो भवेत्सुखः ।।६।।**

न अति+अश्नतः, न अन्+अश्नतः, (न)अति+सुप्तस्य, न जाग्रतः (योगो भवेत्)। युक्त+चेष्टा+आहार+निद्रा+गतेः सुखः योगः भवेत्।६।

तिसरा भाग निदिध्यासन तो योगाच्या **ध्यान** या अंगाशी समानार्थक आहे. याच क्रियायोगात कर्मयोग आणि भक्तियोग यांचाही अंतर्भाव आहे. ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम कर्मानुष्ठान म्हणजे कर्मयोग. श्रवण, कीर्तन इत्यादि नवविधा भक्तीला साधन भक्ती म्हणतात. दुसरी फलरूप भक्ती म्हणजे ईश्वराविषयी प्रेम. 'ईश्वरचरणाविषयी अंतःकरणात उत्पन्न झालेला निर्व्याज, अव्यभिचारी असा अविच्छिन्न प्रेमप्रवाह म्हणजे प्रेमभक्ती. अशी नारायणतीर्थांची व्याख्या आहे. चित्त प्रेमार्द्र होऊन ईश्वराकार होणे म्हणजे प्रेमभक्ती असे मधुसूदन-सरस्वती म्हणतात.' ही भक्ती अष्टांगयोगातली संप्रज्ञात समाधीच आहे असे भक्तिशास्त्रकार मानतात. १९व्या अध्यायाच्या ३ऱ्या श्लोकात हा विचार श्रीमहाराजांनी मांडलेला आहे. तो पुन्हा वाचण्यासारखा आहे. या श्लोकातील तीनही मोक्षोपाय योगात अंतर्भूत आहेत असे म्हणताना श्रीस्वामिमहाराजांची समन्वयात्मक दृष्टी समजून घेतली नाही तर योग आणि इतर साधने यांचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व असा कदाचित् वाद उद्भवू शकतो. तीनही मोक्षाचे मार्ग परस्परपूरक आहेत आणि त्यांच्यात कांहीच विरोध नाही हा खरा या श्लोकाचा आशय आहे. प.पू. योगिराजांनी म्हटल्याप्रमाणे, 'कोणत्याही प्रकारे अभिनिवेश न ठेवता ईश्वरस्मरणपूर्वक आपापले साधन निष्ठेने करून साधकाने आत्मकल्याण साधण्याकडे विशेष लक्ष द्यावे.'५.

या श्लोकात आहारविहारादींचे नियमन सांगितले आहे.

**आहार** फार जास्ती किंवा फार कमी नसावा. आवश्यक आणि मानवेल तेवढाच आहार घ्यावा. कमी घेतला तर शरीर आणि मन अशक्त होईल व अभ्यासाला साथ देणार नाही. जास्त घेतला तर आळस, झोप आणि रोग यांना आमंत्रण दिल्यासारखे होईल. '*अर्धमानस्य सव्यञ्जनस्य तृतीयमुदकस्य तु। वायोः संचरणार्थाय चतुर्थमवशेषयेत्।।*' अगदी पोटभर जेवूं नये. अर्धे पोट भरेल एवढेच अन्न घ्यावे.

**तस्माद्वैराग्यतोऽभ्यासं गुरोरग्रे वितन्वतः । योगस्य प्राप्य संसिद्धिं विद्वान्मुक्तो भवेद्द्रुतम् ।।७।।**

तस्मात् वैराग्यतः गुरोः अग्रे अभ्यासं वितन्वतः योगस्य संसिद्धिं प्राप्य विद्वान् द्रुतं मुक्तः भवेत्।७।

चौथा भाग पाणी प्यावे आणि उरलेला चौथा भाग वायूच्या संचरणाला रिक्त ठेवावा असे भारतीय आहारशास्त्र सांगते. आहारही आश्रमानुसार अधिक-उणा करावा असे स्मृतिग्रंथांत सांगितले आहे. '*अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः षोडशारण्यवासिनः। द्वात्रिंशत्तु गृहस्थस्य यथेष्टं ब्रह्मचारिणाम्।।*' संन्याशाने आठ घास (तोंड फार न पसरता), वानप्रस्थाने सोळा, गृहस्थाने बत्तीस तर ब्रह्मचाऱ्याने कितीही घास घ्यावेत. युक्त आहार यात आहाराच्या पावित्र्याचाही विचार अपेक्षित आहे. शुचितेने सिद्ध केलेला, देवाला अर्पण केलेला, मित (मोजका) आणि सात्त्विक आहार घ्यावा.

**निद्रा**सुद्धा योग्यच प्रमाणात घेतली पाहिजे. रात्री उशीरा झोपणे आणि सकाळी उशीरा उठणे हे शरीराला वा मनालाही हितावह नाही. सूर्यास्तानंतर ३-४ तासांनी झोपावे व सूर्यास्तापूर्वी एक-दीड तास आधी उठावे असा सर्वसाधारण नियम आहे. अधिक कार्यमग्नता, अधिक हालचाल आणि अधिक प्रवास हे योगाभ्यासाला बाधक आहेत.

'*अत्याहारः प्रयासच प्रजल्पो नियमग्रहः। जनसंगश्च लौल्यंच षड्भिर्योगो विनश्यति।। उत्साहात्साहसाद्धैर्यात्तत्वज्ञानाच्च निश्चयात्। जनसंगपरित्यागात्षड्भिर्योगः प्रसिद्ध्यति।।*' अधिक आहार, अतिश्रम, अतिबडबड, उपवास, फलाहार इत्यादि नियम धरणे, लोकांत जास्ती वावरणे आणि कामासक्ती ह्या सहा गोष्टी योगाला बाधक आहेत. मी चित्त स्थिर करीनच असा उत्साह, साध्य-असाध्य हा विचार दूर सारून साधनाकडे प्रवृत्त होणे हे साहस; यावज्जीव प्रयत्न करीत राहणे, कधीही खिन्न न होणे हे **धैर्य**; संपूर्ण दृश्य विषय, मृगजळाप्रमाणे आभासमात्र अस्थिर आहेत, फक्त परमात्माच स्थिर आहे ही दृढबुद्धी म्हणजे **तत्त्वज्ञान**; शास्त्राचे व गुरूंचे सांगणे पूर्णपणे खरे आहे असा विश्वासरूप **निश्चय**; योगाभ्यासाला प्रतिकूल अशा विषयासक्त **लोकांच्या संगतीचा त्याग**; या सहा गुणांनी योगाची फलसिद्धी होते.६.

**क्षाराम्लतिक्तकटुरुक्षकदन्नशाक-स्त्र्यग्न्यध्वभाङ् न लभतेऽकुशलोऽस्य सिद्धिम् ।**
**शुण्ठीसितासुमनशालिसदन्नमुद्ग-चक्षुष्यशाकघृतदुग्धसदम्बु पथ्यम् ।।८।।**

क्षार+अम्ल+तिक्त+कटु+रुक्ष+कदन्न+शाक+स्त्री+अग्नि+अध्व+भाक् अकुशलः अस्य सिद्धिं न लभेत्। शुण्ठी+सिता+सुमन+शालि+सत्+अन्नम् उद्ग+चक्षुष्य+शाक+ घृत+दुग्ध+सत्+अम्बु पथ्यम्।८।

वैराग्यपूर्वक गुरूच्या दृष्टीसमोर अभ्यास करणाऱ्या साधकाला, योगाची फलसिद्धी प्राप्त होऊन, तो आत्मज्ञान संपन्न होतो व शीघ्र मुक्त होतो.७. खारट, आंबट, कडू, तिखट, स्निग्ध नसलेले जोधळे, उडीद इत्यादि धान्य, आणि प्रायः सर्व भाज्या असे पदार्थ, विशेष आवडीने खाणारा, स्त्रीसंग करणारा कामातुर, अग्नीजवळ बराच वेळ शेकत बसणारा, नेहेमी पायी प्रवास करणारा आणि अभ्यासात हुषारी नसणारा, अशा मनुष्याला योगाची फलसिद्धी प्राप्त होत नाही. सुंठ, साखर, गहू, तांदूळ, वरई, सावे, मूग, डोळ्याला हितकारक अशा भाज्या, तूप, दूध, उत्तम शुद्ध पाणी हे सर्व योगाभ्यास करणाऱ्याला पथ्यरूप हितावह असे आहे. बहुतेक सर्वच शाका (पालेभाज्या) डोळ्यांना हितावह नाहीत. चक्षुषी म्हणजे डोळ्यांना हितावह अशा पाच भाज्या टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी दिल्या आहेत. त्यांची नावे संस्कृत व कंसांत हिन्दी दिली आहेत. जीवन्ती (जीयाति, हरणवेल, हरणदोडा), वास्तु (हेतुया, बथुवा, चंदनबथुवा), मत्स्याक्षी (छछमछरी, मछेछी, सोमवल्लरी), मेघनादा(मा) (चवराई, मोथ) म्हणजे चवळी, पुनर्नवा (करला, घेटुळी). अष्टांगमिथुनाने स्त्रीसेवन, शेकण्याने अग्निसेवन, प्रवासाने अध्वसेवन ही योगाभ्यासाला प्रतिकूल आहेत.८.

**सद्देशे मठिकामध्ये निश्चिन्तो गुरुशिक्षितः । कुशाजिनांशुकेष्वेव हठयोगं समभ्यसेत् ।।९।।**
**गुदमेण्ढ्रोर्ध्वस्थगुल्फमासीनो यतगुः समः । भ्रूमध्यदृग्वान्यपीठैः सिद्धं तत्राप्यदोऽस्ति सत् ।।१०।।**

सत्+देशे, मठिका+मध्ये निश्चिन्तः गुरु+शिक्षितः कुश+अजिन+अंकुशेषु एव हठयोगं समभ्यसेत्।९। गुद+मेण्ढ्र+ऊर्ध्व+गुल्फ+आसीनः यत+गुः समः वा अन्य+पीठैः। अदः सिद्धं तत्र अपि सत् अस्ति।१०।

योगाभ्यासाचे स्थान पवित्र असावे. याविषयी हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे, '*सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे। धनुः प्रमाणपर्यन्त शिलाग्निजडवर्जिते।। एकान्ते मठिकामध्ये स्थातव्यं हठयोगिना।।* हठयोगप्रदीपिका १:१२।।' ज्ञानेश्वरीत ६व्या अध्यायात ११व्या श्लोकावरील भाष्य वाचण्यासारखे आहे. एखाद्या छोट्याशा झोपडीत, दर्भासनावर कृष्णाजिन आणि त्यावर स्वच्छ धुतलेले वस्त्र अशा आसनावर बसावे. निश्चिंत या शब्दाने प्रापंचिक विवंचनापासून शक्य तो दूर राहण्यास सुचविले आहे. हठयोगाचा निर्देश इथे केला आहे. याची व्याख्या टीकेत अशी केली आहे. 'हकार' म्हणजे सूर्य म्हणजेच प्राण आणि 'ठकार' म्हणजे चंद्र अर्थात् अपान. त्या दोहोंचा - प्राण आणि अपान यांचा योग म्हणजे हठयोग.

ह्या हठयोगाचा अभ्यास गुरूंच्या मार्गदर्शनाखालीच करावा हे **गुरुशिक्षितः** या शब्दाने सुचविले आहे. ही सूचना अतिशय महत्त्वपूर्ण आहे. पुढे सांगितलेला योगाभ्यास पुस्तकात वाचून करण्यात धोका आहे. **विद्वान् आणि अनुभवसंपन्न गुरूंच्या उपस्थितीतच हा अभ्यास केला पाहिजे**.९. गुद आणि वृषण यांच्यामध्ये असलेल्या शिवणीवर एका पायाची टाच व शिश्नाच्या वर दुसरी टाच ठेवून, इंद्रियांचा निग्रह करून व दृष्टी भ्रूमध्यावर स्थिर करून बसल्याने सिद्धासन होते. ह्या किंवा इतर आसनावर बसावे. पण हे सिद्धासनच सर्व आसनात श्रेष्ठ आहे. ह्या आसनाच्या अभ्यासाने मूलबंध, उड्डियान बंध व जालंधर बंध हे तीनही अनायास लागतात आणि साधक उन्मनी अवस्थत जातो. (हठयोगप्रदीपिका १:४२) बारा वर्षे सिद्धासनाचा अभ्यास केल्याने योगसिद्धी प्राप्त होते.१०.

**वायुं शक्त्येडयापूर्य हृदि स्थाप्य हनुं जपन् । हंसं शक्त्या कुम्भयित्वा पश्चादाकर्षितोदरः ।।११।।**
**शनैर्विरेचयेदेष प्राणायामः सुसिद्धिदः । पञ्चर्ध्याह्न्यह्न्यशीत्यन्तैः प्रतिसन्ध्यसुयामकैः ।।१२।।**
**गन्तव्यमार्गस्थशक्ति-चालनाद् भस्रया भवेत् । नाडीशुद्धिस्त्रिमासोर्ध्वं प्राणो याति लयं सहृत् ।।१३।।**

वायुं शक्त्या ईडया आपूर्य हनुं हृदि स्थाप्य हंसं जपन् शक्त्या कुम्भयित्वा, पश्चात् आकर्षित+उदरः।११। शनैः विरेचयेत्। एष प्राणायामः सु+सिद्धि+दः। अह्नि अह्नि पंच+ऋध्या अशीति+अन्त्यैः प्रति+सन्धि+असु+यामकैः।१२। भस्रया गन्तव्य+मार्गस्थ+शक्ति+चालनात् त्रि+मास+ऊर्ध्वं नाडी+शुद्धिः भवेत्। प्राणः सहृत् लयं याति।१३।

शक्तीप्रमाणे डाव्या नाकपुडीने वायू आत घेऊन म्हणजे **पूरक** करून, हृदयावर हनुवटी ठेवून गायत्री-मंत्र किंवा सोहंमंत्र यांचा मानसिक जप करीत राहून, शक्तीप्रमाणे **कुंभक** करून, नंतर आपले पोट आत ओढून(११) साधकाने तो वायू हळूहळू उजव्या नाकपुडीने बाहेर सोडावा म्हणजे **रेचक** करावा. हा पूरक, कुंभक व रेचक मिळून एक प्राणायाम होतो. तो उत्तम सिद्धी देणारा आहे. असे प्राणायाम प्रतिदिवशी त्रिकाल करावेत व ते पाच पाच या प्रमाणाने वाढवून ऐंशीपर्यंत न्यावेत.१२. तसेच, पुढे सांगितलेली भस्रिका व प्राणवायूच्या गमनाला योग्य अशा सुषुम्णा मार्गातील शक्तीचे चालन करावे. याप्रमाणे प्राणायाम, भस्रिका व शक्तिचालन या तीन साधनांच्या अभ्यासाने तीन महिन्यांनंतर सर्व नाड्यांची शुद्धी होते आणि प्राणवायू चित्तासह विलीन होतो.१३. हा सुषुम्णेत प्रवेश केलेला प्राण ब्रह्मरंध्रात (टाळू) जाऊन तिथे दोन पळे आणि पाच विपळे (५० सेकंद) इतका वेळ स्थिर झाला की एक **प्राणायाम** होतो.१४. इथून हा काळ बारापट वाढत गेला की अनुक्रमे **प्रत्याहार** (१०मिनिटे), **धारणा** (दोन तास), **ध्यान** (चोवीस तास) आणि **समाधी** (बारा दिवस) सिद्ध होतात. बारा दिवसांची **समाधी** ही अत्यंत दुर्लभ आहे.१५.

**प्राणायाम** म्हणजे आपल्या शरीरात संचार करणारा जो **प्राण** नामक वायू आहे त्याचा **आयाम** म्हणजे निरोधन. याचे तीन प्रकार आहेत. शरीराबाहेरील वायू आत ओढून घेणे याला **पूरक** म्हणतात. तो कुंभ म्हणजे घागरीत भरल्यासारखा शरीरात धरून ठेवणे याला **कुंभक** म्हणतात. आणि तो वायू बाहेर सोडणे याला **रेचक** असे नाव आहे.

**लीनः सपञ्चविपल-द्विपलं सोऽसुयामकः । ब्रह्मरन्ध्रे वर्धमानः प्रत्याहारादयः स तु ।।१४।।**

स+पञ्च+विपलं+द्विपलं ब्रह्मरंध्रे लीनः सः असु+यामकः। सः वर्धमानः तु प्रत्याहार+आदयः।१४।

बहुतेक कुंभक पूरकानंतर केले जातात. त्यांना पूरकपूर्वक कुंभक म्हणतात. सूर्यभेदन, उज्जायी इत्यादि त्यांची उदाहरणे आहेत. रेचकानंतर प्राण बाहेरच अडवून धरणे ह्याला रेचकपूर्वक कुंभक (बहिःकुंभक) म्हणतात. रेचक किंवा पूरक न करता प्राण नाकपुड्यांतच धरून ठेवणे याला केवलकुंभक म्हणतात. (*'न रेचको नैव च पूरकोऽत्र नासापुटे संस्थितमेव वायुं। सुनिश्चलं धारयते क्रमेण कुंभाख्यमेतत्प्रवदन्ति तज्ज्ञाः।।'*)

**प्राणायामाच्या श्रेणी -** प्राणायामाच्या श्रेणी त्याच्या कालावरून ठरतात. त्यासाठी मात्रा हे माप आहे. साधारणतः मनुष्य झोपलेला असताना त्याचा एक श्वासोच्छ्वास व्हायला लागणारा काळ म्हणजे मात्रा. हा काळ गुडघ्यावरून हात फिरवून एक चुटकी वाजवायला लागणाऱ्या काळाइतका स्कंद पुराणात सांगितला आहे. बारा मात्रांचा प्राणायाम साधारण, चोवीस मात्रांचा मध्यम आणि छत्तीस मात्रांचा उत्तम प्राणायाम होतो. साधारण प्राणायामाने घाम येतो, मध्यम प्राणायामाने शरीर कापते आणि उत्तम प्राणायामाने प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिरावतो.

प्राणायाम प्रातः, माध्याह्न, सायं आणि मध्यरात्री करावेत. मध्यरात्री करण्यास अशक्त असेल त्याने त्रिकाल करावेत. वर सांगितल्याप्रमाणे एका वेळी ऐंशी प्राणायाम केल्याने रोज २४० प्राणायाम होतात. तीन महिन्यांत २१६००, म्हणजे २४ तासांतील श्वासांच्या संख्येइतके प्राणायाम होतात. हे प्राणायामांचे एक पुरश्चरणच होते. याचे फळ नाडीशुद्धी हे सांगितले आहे. नाडीशुद्धीची लक्षणे हठयोगप्रदीपिकेत २ऱ्या उपदेशात पुढीलप्रमाणे दिली आहेत. *'यदा तु नाडीशुद्धिः स्यात्तदा चिन्हानि ब्राह्यतः। कायस्य कृशताकांतिस्तदा जायेत निश्चितम्।।१९।। यथेष्टधारणं वायोरनलस्य प्रदीपनम्।नादाभिव्यक्तिरारोग्यं जायते नाडिशोधनात।।२०।।*

**स्वकालद्वादशगुणोत्तरकालावधिः स्मृतः । समाधिर्द्वादशदिन-साध्यः परमदुर्लभः ।।१५।।**

स्वकाल+द्वादश+गुण+उत्तर+काल+अवधिः स्मृतः। समाधिः द्वादश+दिन+साध्यः परम+दुर्लभः।१५।

शरीर कृश परंतु तेजस्वी होणे, वायु कितीही वेळ धरून ठेवता येणे, जठराग्नी प्रदीप्त होणे, आपल्या शरीरांत अनाहत नाद ऐकू येणे आणि आरोग्य ही ती लक्षणे आहेत. प्राणायामाच्या पूर्वतयारीसाठी शरीरातील कफ, लठ्ठपणा इत्यादि दोषांच्या शुद्धीसाठी धौती, बस्ती, नेति, त्राटक, नौली आणि कपालभाति अशा **षट्क्रिया** हठयोगात सांगितल्या आहेत. याज्ञवल्क्यादी आचार्यांच्या मते हे दोष प्राणायामानेच दूर होतात. त्यामुळे श्रीमहाराजांनी इथे षट्क्रिया सांगितल्या नाहीत. कपालभाति पुढे सांगितली आहे.

**बंधत्रय -** पूरकानंतर हनुवटी छातीला टेकून कुंभक करावा असे जे वर सांगितले आहे त्या क्रियेला **जालंधरबंध** असे म्हणतात. (*कंठाकुंचनपूर्वकं चिबुकस्य हृदि स्थापनं जालधरबंधः।३*) कुंभकानंतर रेचकाच्या आधी पोट आत पाठीकडे ओढायला सांगितले आहे तो **उड्डियान बंध** होय. (*प्रयत्नविशेषेण नाभिप्रदेशस्य पृष्ठत आकर्षणमुड्डियानबंधः*) पूरकाच्या आधी **मूलबंध** (शिवणीवर टाचेने दाबून गुदद्वाराचे आकुंचन) केला जातो. (*पार्ष्णिभागेन (गुल्फयोरधः प्रदेशः) योनिस्थानसंपीडनपूर्वकं (योनिस्थानं गुदमेढ्रयोर्मध्यभागं) गुदस्याकुंचनं मूलबंधः*). पूरकाच्या आधी मूलबंध व नंतर जालंधरबंध केल्याने प्राण ब्रह्मनाडीत म्हणजेच सुषुम्णेत प्रवेश करतो असे हठयोगप्रदीपिकेत सांगितले आहे. *पूरकांते तु कर्तव्यो बंधो जालंधराभिधः। कुंभकान्ते रेचकादौ कर्तव्यस्तूड्डियानकः।। अधस्तात्कुंचनेनाशु कंठसंकोचने कृते । मध्ये पश्चिमतानेन स्यात्प्राणो ब्रह्मनाडिगः।।* (हठयोगप्रदीपिका २।४५-४६)

या तीन बंधांचे फळ **कुंडलिनी शक्तीचे जागरण** हे आहे. ब्रह्मनाडीत प्राणाचा प्रवेश त्याचाच संकेत देते. हठयोगप्रदीपिकेत याचे असे वर्णन आहे. *अपाने ऊर्ध्वगे जाते प्रयाते वन्हिमण्डलम्। तदाऽनलशिखा दीर्घा जायते वायुनाऽऽहता।।६६।। ततो यातो वन्ह्यपानौ प्राणमुष्णस्वरूपकम्। तेनात्यन्तप्रदीप्तस्तु ज्वलनो देहजस्थता।।६७।। तेन*

**समासीनो यतास्योऽन्तः-प्राणं दक्षिणया त्यजेत् । सारं लगति हृत्कण्ठ-कपोलावध्यसौ यथा ।।१६।।**
**लोहकारस्य भस्रावच्छक्त्याश्वापूर्य रेचयेत् । वामां मध्यानामिकाभ्यां धृत्वा जाते श्रमे विधेः ।।१७।।**
**पीत्वा प्राणं कुम्भयित्वा धृत्वाङ्गुष्ठेन दक्षिणम् । वामया रेचयेन्मन्दं तथाथ प्राग्वदाचरेत् ।।१८।।**
**द्विनाड्यभ्यासाद्यामार्धं शक्तिर्मार्गं ददात्यरम् । भस्रेयं सर्वदोषघ्नी रुक्पापघ्न्यपि सिद्धिदा ।।१९।।**

सं+आसीनः यत+आस्यः अन्तः+प्राणं दक्षिणया स+आरं त्यजेत् यथा असौ हृत्+कण्ठ+कपोल+अवधि लगति।१६। लोहकारस्य भस्रावत् शक्त्या आशु आपूर्य वामां मध्य+अनामिकाभ्यां धृत्वा रेचयेत्। विधेः श्रमे जाते..।१७। प्राणं पीत्वा अङ्गुष्ठेन दक्षिणं धृत्वा वामया मन्दं रेचयेत्। तथा अथ प्राक्+वत् आचरेत्।१८। द्वि+नाडी+अभ्यासात् शक्तिः अरं मार्गं ददाति। इयं भस्रा सर्व+दोष+घ्नी, रुक्+पाप+घ्नी अपि सिद्धि+दा।१९।

*कुण्डलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते। दण्डाहता भुजङ्गीव निःश्वस्य ऋजुतां व्रजेत्।।६८।। बिलं प्रविष्टेव ततो ब्रह्मनाड्यन्तरं व्रजेत्। तस्मान्नित्यं मूलबंधः कर्तव्यो योगाभिः सदा।।६९।।* (ह.यो.प्र. ३). मूलबंधाच्या अभ्यासाने ऊर्ध्वगामी झालेला अपानवायू वह्निमंडलात (मणिपूर चक्रांत) प्रविष्ट झाला की वायूने प्रेरित होऊन एक उंच अग्निशिखा निर्माण होते आणि देहस्थ अग्नी अत्यंत प्रदीप्त होतो. त्याने तापलेली कुंडलिनी जागते आणि आपली वक्रता सोडून काठीने मारलेल्या नागिणीसारखी सरळ आणि ताठ होते. मग सुषुम्णेच्या मुखात शिरून ब्रह्मनाडीत जाते.

**भस्त्रिका -** प्रथम समस्थितीत बसावे. समस्थिती म्हणजे सरळ पण ताणरहित. तोंड बंद करावे आणि फुप्फुसातला प्राणवायु हृदय, कंठ आणि गालाला लगटून लोहाराच्या भात्यासारखा आवाज करीत बाहेर सोडावा (रेचक करावा).१६. डावी नाकपुडी मधले बोट आणि अनामिका यांनी दाबून बंद करून उजव्या नाकपुडीने वायू वेगाने आवाज करीत आत घेऊन (पूरक), कुंभक न करता त्याच नाकपुडीने पुन्हा बाहेर सोडावा. असे भराभर पूरक व रेचक केल्यावर श्रम झाल्यावर(१७) पूरक करून अंगठ्याने उजवी नाकपुडी बंद करून डाव्या नाकपुडीने हळूहळू रेचक करावा. मग आधीच्यासारखेच भात्यासारखा आवाज करीत वेगाने रेचक आणि पूरक डाव्या नाकपुडीने करावेत.१८. दोन्ही नाड्यांनी

**शिश्ननाभ्यन्तस्थकन्दं सति वज्रासने पदौ । धृत्वा दृढं प्रपीड्यारं भस्रां सिद्धासनस्थितः ।।२०।।**
**समाकुञ्चितनाभिर्द्राक् कुर्याच्छक्तिश्चलत्यतः । यामार्धाभ्यासतो धैर्यान्मध्यनाड्यां समुद्गता ।।२१।।**
**ऊर्ध्वाकृष्टा भवेत्किञ्चिच्छक्तिर्नाडीमुखं त्यजेत् । ततः स्वतो व्रजत्यूर्ध्वं प्राणोऽतस्तां विचालयेत् ।।२२।।**
**चालनात्सर्वसिद्ध्याप्तिर्-मण्डलाद्योगिनो न तु । रुग्भ्यो भयं यमाच्चापि नेतोऽन्यन्नाडिशोधनम् ।।२३।।**

वज्र+आसने सति पदौ दृढं धृत्वा शिश्न+नाभि+अन्तस्थ+कन्दं प्रपीड्य सिद्धासन+स्थितः..।२०। सं+आकुंचित+नाभिः द्राक् भस्रां कुर्यात्। अतः शक्तिः चलति। धैर्यात् याम+अर्ध+अभ्यासतः मध्यनाड्यां समुद्गता..।२१। शक्तिः किञ्चित् ऊर्ध्व+आकृष्टा भवेत्, नाडी+मुखं त्यजेत्। ततः प्राणः स्वतः ऊर्ध्वं व्रजति। अतः तां विचालयेत्।२२। चालनात् मण्डलात् योगिनः सर्व+सिद्धि+आप्तिः, रुक्+भ्यो भयं न, यमात् अपि च (च)। इतः अन्यत् नाडि+शोधनं न।२३।

(नाकपुड्यांनी) मिळून भस्रिकेचा अभ्यास अर्धा प्रहर (दीड तास) केल्यावर शक्ती (प्राणाला) शीघ्र (पश्चिम) मार्ग देते. म्हणजे कुंडलिनीचा सुषुम्णेत प्रवेश करून देते. ह्या भस्रिकेच्या अभ्यासाने कफादि दोष, रोग आणि पाप यांचा नाश होतो.१९. हठयोगप्रदीपिकेत (२:४४) आठ प्रकारचे कुंभक सांगितलेले आहेत. सूर्यभदेन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्रिका, भ्रामरी, मूर्छा आणि प्लावनी (*सूर्यभेदनमुज्जायी सीत्कारी शीतली तथा। भस्रिका भ्रामरी मूर्छा प्लावनीत्यष्ट कुंभकाः*।।२:४४।।). इथे श्रीस्वामिमहाराजांनी विशेष महत्त्वाच्या भस्रिकेचेच मुख्यतः वर्णन केले आहे.

**शक्तिचालन -** शिश्न आणि नाभी यांच्यामध्ये नऊ अंगुळे (बोटे) लांबीचा अंडाकार कंद असतो. त्याच्यापासून शरीराच्या ७२ हजार नाड्या उगम पावतात. '*ऊर्ध्वं मेंढ्रादधो नाभेः कंदयोनिः खगांडवत्। तत्र नाड्यः समुत्पन्नाः सहस्त्राणां द्विसप्ततिः।।*' (गोरक्षनाथ). त्यांपैकी मुख्य नाडी सुषुम्णा आहे. तिचे मुख कुंडलिनी शक्तीने अडवलेले असते. तिला विचलित करणे हा कंदताडनाचा उद्देश्य आहे. वज्रासनावर बसून दोन्ही पाय घट्ट धरून दोन्ही टाचांनी त्या कंदाला ताडन करावे.२०. नंतर पुनश्च सिद्धासन घालून गुरूंकडून समजून घेतलेल्या परिधानयुक्तीने बेंबीचे

**चालितायामपि प्राणो बद्धा चेद्रसना सुखम् । व्रजत्यूर्ध्वं सिद्धिपूर्वं राजयोगपदप्रदः ।।२४।।**
**जिह्वां मूलशिरां छित्वा रोममात्रं प्रघर्षयेत् । पथ्यासैन्धवचूर्णैर्गां प्राग्वत्सप्तदिनैर्मुहुः ।।२५।।**
**षण्मासादिति जिह्वाधः शिराबन्धो विनश्यति । मुद्रा स्यात् खेचरी त्र्यध्वे योजिताऽवाङ्मुखी कला ।।२६।।**
**सहृज्जिह्वा चरत्यस्य खे कदापि स्पृशन्ति नो । विषार्तिरुग्जराक्षुत्तृण्निद्रातन्द्रामृतिक्रियाः ।।२७।।**
**स्त्र्याश्लेषितस्यापि बिन्दुर् न क्षरत्यूर्ध्वमेति सः । चलितश्चेद्योनिमुद्रा-बद्धो मुक्तः स भोग्यपि ।।२८।।**

(शक्तेः) चालितायां अपि रसना बद्धा चेत् राजयोगप्रदः प्राणः सुखं सिद्धि+पूर्वं ऊर्ध्वं व्रजति।२४। जिह्वां मूल+शिरां छित्वा गां पथ्या+सैंधव+चूर्णैः रोम+मात्रं प्रघर्षयेत्। मुहु सप्त+दिनैः प्राक्+वत्।२५। इति षण्+मासात् जिह्वा+अधः शिरा+बन्धः विनश्यति।२६। अवाक्+मुखी कला त्रि+अध्वे योजिता खेचरी मुद्रा स्यात्।२६। अस्य जिह्वा सहृत् खे चरति। विष+आर्ति+रुक्+जरा+क्षुत्+तृट्+निद्रा+तंद्रा+मृति+क्रियाः कदा अपि नो स्पृशन्ति।२७। स्त्री+आश्लेषितस्य अपि बिन्दुः न क्षरति, सः ऊर्ध्वं एति। चलितः चेत् योनि+मुद्रा+बद्धः सः भोगी अपि मुक्तः।२८।

आकुंचन करून लगेच भस्रा करावी. याने कुंडलिनी शक्ती विचलित होते. धैर्याने अर्धा प्रहर अभ्यास केल्यावर सुषुम्णेत प्रवेशलेली(२१) शक्ती थोडीशी वर खेचली जाते आणि सुषुम्णेचे मुख सोडून प्राणाला वाट करून देते. मग प्राण आपोआपच वर ब्रह्मरंध्राकडे जाऊ लागतो. याकरिता शक्तीला विचलित करायला पाहिजे.२२. शक्तिचालनाच्या अभ्यासाने एका मंडलात (४० दिवस) योग्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. रोगाचेच काय, पण मृत्यूचेही भय उरत नाही. शक्तिचालनासारखा दुसरा नाडीशुद्धीचा उपाय नाही. शक्तिचालनाला कुंडलिनीचे जागरण असेही म्हणतात.२३.

शक्तीचे चालन झाल्यावर ती सुषुम्णेतून वर चढवायची असते. जिह्वा जर खेचरी मुद्रेने बांधली तर शक्ती अधिक सुखाने ब्रह्मरंध्राकडे जाते. प्राणाची गती सहस्रार चक्राकडे झाली की राजयोग सिद्ध होतो आणि साधकाला अणिमादि सिद्धींची प्राप्ती होते.२४. ही खेचरी मुद्रा सिद्ध करण्यासाठी प्रथम जीभेच्या मुळाशी असलेली शीर कापून ती मोकळी

**सुधान्तःस्रवतीन्दोस्तां ग्रसत्यर्कस्ततो जरा । अधःशीर्षोर्ध्वपात्तिष्ठेद् बह्वाहारः शनैः शनैः ।।२९।।**
**याममात्रं ततः सिद्धिर्व्यस्तेयं करणीष्टदा । वलीपलितवेपघ्नी मृत्युहर्त्री सुधाप्रदा ।।३०।।**

इन्दोः सुधा अन्तः स्रवति। तां अर्कः ग्रसति। ततः जरा। अधः+शीर्षः ऊर्ध्व+पात् तिष्ठेत्। शनैः शनैः बहु+आहारः।२९। ततः याम+मात्रं सिद्धिः। इयं इष्ट+दा वली+पलित+वेप+घ्नी मृत्यु+हर्त्रा सुधाप्रदा व्यस्ता करणी।३०।

करायला हवी. हे छेदन अगदी काळजीपूर्वक थोडे थोडे करावे लागते. प्रथम ती शीर निवडुंगाच्या पानासारख्या शस्त्राने अगदी केसभर कापावी आणि हिरडा आणि शेंदीलोण यांचे मिश्रण तिथे चोळावे. यानंतर जीभ शिरेपासून सोडविण्यासाठी आणि लांब करण्यासाठी तिचे चालन आणि दोहन करावे. म्हणजे ती दोन्ही हातांचे अंगठे आणि बोटांनी धरून पुढे-मागे आणि डावी-उजवीकडे ओढून लांबवावी आणि शिरेपासून सुटी करावी. सात दिवसांनी पुन्हा तशीच केसभर कापून पूर्वीप्रमाणेच दोहन-चालनादि करावेत.२५. अशा रीतीने अभ्यास केल्याने सहा महिन्यांत जिभेच्या..

..खालचा शिराबंध पूर्ण सुटतो. तसेच जीभेची लांबी इतकी होते की ती बाहेर काढून तिचा शेंडा भ्रूमध्याला लावता येतो. आता ही जीभ उलटी फिरवून पडजिभेच्या वरच्या छिद्रांतून भ्रूमध्याच्या आतल्या भागाला टेकवली की खेचरी मुद्रा सिद्ध होते.२६. ह्या मुद्रेत साधकाची जिह्वा मनासह आकाशांत जाते (*खे चरति*) म्हणून तिला खेचरी म्हणतात. हिचे फळ असे आहे की त्या योग्याला विषबाधा, रोग, वार्धक्य, तहान, भूक, निद्रा, तंद्रा, मृत्यू कधीही स्पर्श करीत नाहीत.२७. अशा योग्याचे वीर्य स्त्रीच्या आलिंगनानेही स्खलित होत नाही. आणि स्खलन झाले तरीही तो योनी (वज्रोली) मुद्रेच्या अभ्यासाने वर खेचू शकतो. योगशास्त्राच्या सिद्धांतानुसार हे वर ओढलेले शुक्ल वीर्य शिवणीच्या आंतल्या योनिस्थानांतील पोवळ्यासारख्या रक्त वीर्याशी संयुक्त होते आणि त्याचे ओजात रूपांतर होऊन ते सुषुम्णेतून सहस्रार चक्राकडे जाते. असा योगी भोगी असला तरी तो मुक्तच असतो.२८.

**स्वास्येऽग्नौ दीप्तेऽङ्गसादे नाडीशुद्धावनामये । नादस्फुटत्वे सुदृष्ट्याः सिद्धिर्बिन्दौ जिते सति ।।३१।।**
**विविधा उपसर्गाः प्राक् संभवन्त्यत्र योगिनः । सद्गुरोर्दृढभक्त्या ते प्रणश्यन्ति न चान्यथा ।।३२।।**
**कारणं कर्मारुरुक्षोर्योगिनो योगमुत्तमम् । शमः कारणमस्याग्रे योगारूढस्य योगिनः ।।३३।।**
**कामवेगसहोऽन्तर्दृक् सुखारामोऽभितो यतिः । ब्रह्मनिर्वाणमेत्येव ब्रह्मभूतोऽमलः समः ।।३४।।**

सु+आस्ये, अग्नौ दीप्ते, अङ्गसादे, नाडी+शुद्धौ, अनामये, नाद+स्फुटत्वे, सु+दृष्ट्या, बिन्दौ जिते सति सिद्धिः।३१। प्राक् योगिनः विविधा उपसर्गाः संभवन्ति। ते सत्+गुरोः दृढ+भक्त्या प्रणश्यन्ति। अन्यथा च न।३२। उत्तमं योगं आरुरुक्षोः योगिनः कर्म कारणम्। अस्य योग+आरूढस्य योगिनः अग्रे शमः कारणम्।३३। काम+वेग+सहः अन्तः+दृक् अभितः सुख+आरामः ब्रह्मभूतः समः यतिः ब्रह्म+निर्वाणं एति एव।३४।

टाळूच्या आतील चंद्रापासून अमृतस्राव होत असतो. पण बेंबीच्या आतील सूर्य ते खाऊन टाकतो. हेच वार्धक्याचे कारण आहे. या अमृताचेच पान खेचरी मुद्रेने योगी करत असतो. हे अमृत सूर्यापासून राखून पान करण्यासाठी खाली डोके आणि वर पाय अशा स्थितीत राहावे. याने हळूहळू आहार वाढत जातो. म्हणून या मुद्रेचा अभ्यास करताना आहार भरपूर घ्यावा. आरंभी क्षणभर अभ्यास करून तो हळूहळू वाढवीत एक प्रहर (तीन तास) झाला की ही विपरीतकरणी मुद्रा सिद्ध होते. अमृताचा लाभ करून देऊन, अंगावर सुरुकत्या, अकाली केस पांढरे होणे, कंप यांना दूर करून ही मृत्यूला दूर करणारी आहे.२९.

इथे हठयोगाचे निरूपण पूर्ण होते. त्या योगाचे फळ या श्लोकात सांगितले आहे. कांतियुक्त मुख, जठराग्नीचे प्रदीपन, शरीराचे कार्श्य, नाड्यांची शुद्धी, निरोगता, अनाहत नादाचे प्राकट्य, निर्दोष दृष्टी आणि बिंदुजय ही हठयोगाच्या सिद्धीची आठ लक्षणे जाणावीत.३१. पण या सिद्धीच्या मार्गात अनेक विघ्ने आहेत ही सावधानतेची सूचना श्रीस्वामिमहाराज करीत आहेत. पतंजलींनी योगसूत्रांत (१:३०) व्याधि, स्त्यान, आलस्य, अविरति, भ्रान्तिदर्शन,

**कश्चिद्धारणयोपास्ते ध्यानात्कश्चित् समाधिना । आत्मानमेवमाप्त्वेमां सिद्धिं मुक्तो भवत्यसौ ।।३५।।**
**हृद्युपास्यो धारणया वराभयकरो हरिः । प्रादेशमात्रः सुसिद्धः खेचरीमुद्रया युतः ।।३६।।**
**अङ्गुष्ठमात्रं पुरुषं दत्तात्रेयं दिगम्बरम् । ध्यायेत्सिद्धासनासीनं द्युनिशं कण्ठसंस्थितम् ।।३७।।**

कश्चित् धारणया उपास्ते, (कश्चित्) ध्यानात् (उपास्ते), कश्चित् समाधिना (उपास्ते)।३५। प्रादेश+मात्रः वर+अभय+करः सुसिद्धः खेचरी+मुद्रया युतः हरिः हृदि धारणया उपास्यः।३६। अङ्गुष्ठ+मात्रं दिगंबरम् सिद्ध+आसीनं पुरुषं दत्तात्रेयं कण्ठ+संस्थितं द्यु+निशं ध्यायेत्।३७।

अलब्धभूमिकत्व इत्यादि अंतराय सांगितले आहेत. योगशास्त्रातील ग्रंथांत आणि मार्कंडेयादि पुराणांतही त्यांचे सविस्तर वर्णन आहे. श्रीमहाराजांच्या मते ह्या सर्व विघ्नांवर सद्गुरूंची दृढ भक्ती हाच एकमेव उपाय आहे. पतंजलींनीही सर्व गुरूंचाही गुरू जो परमेश्वर, त्याच्या वाचकाच्या - प्रणवाच्या किंवा नामाच्या जपाने अंतरायांचा अभाव होतो (१:२९) असे सांगितले आहे.३२. तेहतिसावा श्लोक भगवद्गीतेतील श्लोकाचा (६:३) अनुवादच आहे. योगाची सिद्धी पावण्यासाठी कर्म हेच साधन आहे. योग सिद्ध झाल्यावर त्या योग्याने कर्माचा त्याग करून - संन्यास घेऊन शमदमादींचा - उपलक्षणाने ज्ञानयोगाचा, अभ्यास करावा. असा थोडक्यात अभिप्राय आहे. श्रीमच्छंकराचार्यांनी या..

..श्लोकाच्या टीकेत स्पष्ट केल्याप्रमाणे, निष्काम कर्मयोग हे ध्यानयोगाचे साधन आहे असे म्हटले आहे. आतापर्यंत पाहिलेला हठयोग हा कर्मयोगातच अंतर्भूत आहे. कर्मयोगाने शुद्ध झालेले चित्त समाधानरूपी योगात स्थिरावते. ते चित्त जसे जसे स्थिर होईल तसा तसा योगी कर्मापासून निवृत्त होत जाईल.३३.

**प्रत्याहार - अन्तर्दृक्** म्हणजे ज्याची दृष्टी आदि इन्द्रिये बाह्य विषयाना सोडून आत वळली आहेत. ज्याची इंद्रिये कासवाच्या अवयवांप्रमाणे विषयांपासून आत ओढली जातात त्याची प्रज्ञा स्थिर होते, असे भगवद्गीतेत प्रत्याहाराचे (२:५८) वर्णन आहे.

**सहस्रदलपद्मस्थं सुसूक्ष्मं शान्तमुज्ज्वलम् । समाधिना द्वादशाहं तन्मयो भावयेत्परम् ।।३८।।**

सहस्र+दल+पद्म+स्थं शांतं उज्ज्वलं सुसूक्ष्मं परं तत्+मयः समाधिना द्वादश+अहं भावयेत्।३८।

त्यामुळेच तो कामाचा वेग सहन करू शकतो. भगवद्गीतेत (५:२३) सांगितल्याप्रमाणे जिवंतपणीच कामक्रोधांचे वेग सहन करणाराच योगी व सुखी होतो. तसेच बुद्धिग्राह्य अतींद्रिय सुखांत (६:२१) तो रमलेला असतो. 'मग जे जे कां निमिख। देखेल माझे सुख। तेतुलेनि अरोचक। विषयीं घेईल।।१२:१०६।।' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे प्रत्याहार आणि आंतरिक सुख आणि हे परस्परसंवर्धक आहेत. या अभ्यासानेच योगी चित्ताचे सर्व मल दूर करून ब्रह्मरूप होऊन ब्रह्मनिर्वाण पावतो. तो सम म्हणजे सुदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जातो. **यतिः** या शब्दाने ही अवस्था दुर्लभ आहे.३४.

कुणी धारणेच्या अभ्यासाने, कुणी ध्यानाने तर कुणा समाधीने आत्म्याची उपासना करतात आणि ही सिद्धी प्राप्त करून मुक्त होतात. आता पुढील एकेका श्लोकाने धारणा, ध्यान आणि समाधी ह्यांचे वर्णन केले आहे.३५.

**धारणा -** पतंजलींच्या मते (३:१) मनाला एका देशात बांधणे म्हणजे धारणा (*देशबन्धश्चित्तस्य धारणा।*). बाहेरच्या किंवा शरीरांतर्गत आलंबनावर चित्त स्थिर करून ठेणे हे धारणेचे लक्षण आहे. गरुडपुराणात धारणेला उपयुक्त असे दहा देश सांगितले आहेत. नाभी, हृदय, छाती, गळा, तोंड, नेत्र, भ्रूमध्य, टाळू आणि त्याच्या थोडा वरचा देश. विष्णुपुराणात भगवंताच्या सगुण मूर्तीवरही धारणा करता येते. '*मूर्तं भगवतो रूपं सर्वोपाश्रयनिःस्पृहम्। एषा वै धारणा ज्ञेया यच्चित्तं तत्र धार्यते।।*' या श्लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी हृदयाच्या देशात, अनाहत चक्रात, एक वीतभर उंचीच्या वर आणि अभय मुद्रा दाखविणाऱ्या, खेचरी मुद्रेने युक्त अशा पापतापहर दत्तप्रभूंची धारणा करायला सांगितली आहे. ही धारणा अशी केली पाहिजे की संसारांतील कर्तव्ये करतांनाही चित्त तिथून ढळायला नको. धारणेची एक व्याख्या अशी आहे की वृत्ती त्यांत ध्येयाकार होते; पण त्यांत इतर वृत्ती आणि व्यवधान येत राहते. म्हणजेच धारणेतील चित्ताची एकाग्रता ही विच्छिन्न असते.३६.

**अन्तर्लीनसहृत्प्राणो पश्यन्नचलदृग्बहिः । मुद्रेयं शाम्भवी शून्याशून्यलक्ष्मपदप्रदा ।।३९।।**

अचल+दृक् बहिः पश्यन् अन्तः+लीन+सहृत्+प्राणः। इयं शून्य+अशून्य+लक्ष्म+प्रदा शाम्भवी मुद्रा।३९।

**ध्यान -** पुढच्या श्लोकांत ध्यान सांगितले आहे. पतंजलींनी म्हटले आहे, '*तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्।*' ध्यानात ध्येयाकार झालेली वृत्ती अविच्छिन्न आहे. चित्त अखंड तेलाच्या धारेसारखे ध्येयाकडे प्रवाहित होणे, त्यात कसलीही दुसरी वृत्ती न उठणे हे ध्यानाचे लक्षण आहे. इथे श्रीस्वामिमहाराजांनी कंठामध्ये अंगठ्याएवढ्या, सिद्धासनस्थ, दिगंबर पुरुषाचे ध्यान करायला सांगितले आहे. चित्त एक दिवस व एक रात्र (२४ तास) असे स्थिर झाले की ध्यान सिद्ध होते. मागच्या श्लोकांत वीतभर मूर्तीचे ध्यान सांगितले. आता अंगठाभर रूपाचे सांगत आहेत. याचाच अर्थ आलंबन अधिकाधिक सूक्ष्म करायचे आहे.३७.

**समाधी -** ध्यान सिद्ध झाले की समाधीचा अभ्यास करावा. समाधीचा विषय अत्यंत सूक्ष्म, शांत, तेजोमय भगवत्स्वरूप असून स्थान ब्रह्मरंध्रातील सहस्रदलपद्म आहे. ध्यान जेव्हा इतके प्रगाढ होते की योग्याची जाणीव नाहीशी होते. फक्त ध्येयाचेच भान शिल्लक राहते. *तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः।* (योगसूत्र ३:३). समाधीचा काळ बारा दिवसांचा आहे. *अवध्यः सर्वशस्त्राणामशक्यः सर्वदेहिनाम्। अग्राह्यो मंत्रयंत्राणां योगी मुक्तः समाधिना।।* (हठयोगप्रदीपिका ४:११३) समाधी सिद्ध झालेल्या योग्याचा कोणत्याही शस्त्राने वध होत नाही; कुणाही देहधारी जीवाकडून त्याचा पराभव होऊ शकत नाही. मंत्र किंवा यंत्रांचा त्याच्यावर प्रभाव पडत नाही.३८.

**शांभवी मुद्रा -** प्राण आणि मन अंतराकाशांत लीन असतांना निमेषोन्मेषरहित उघडे डोळे मात्र कांहीच न पाहता बाहेर लागलेले आहेत. अशी शून्य आणि अशून्य परमात्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारी शांभवी मुद्रा आहे. **शं** म्हणजे सुख ज्या मुद्रेने होते **भ**वति ती **शांभवी**. **मुत्** अर्थात् निर्विकल्प आनंद - **रा**ति - देणारी, ती **मुद्रा**.

**तद्वान् दृढासनो दक्ष-कर्णे रुद्धबिलो ध्वनिम् । त्रिग्रन्थिभेदं शृणुयात् सुसूक्ष्मं स समाधिभाक् ।।४०।।**
**यमेन दशधा नूनं दशधा नियमेन च । आसनाद्येन षट्केन योगोऽष्टाङ्गोऽयमुच्यते ।।४१।।**

तत्+वान् दृढ+आसनः रुद्ध+बिलः त्रि+ग्रन्थि+भेदं सुसूक्ष्मं ध्वनिं शृणुयात्। सः समाधि+भाक्।४०। दशधा यमेन, दशधा नियमेन च, एन आसनादि षट्केन नूनं अयं अष्ट+अङ्गः योगः उच्यते।४१।

**शून्य** म्हणजे देहादि उपाधिरहित; आणि **अशून्य** म्हणजे निषेधाच्याही अतीत ह्या लक्षणांचे योग्यांनाच गमणारे (*गम्यते अनेन*) **पद** पावविणारी ही मुद्रा आहे. हठयोगप्रदीपिकेत हिचे असे वर्णन आहे, '*अंतर्लक्ष्यं बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता। एषा सा शांभवीमुद्रा वेदशास्त्रेषु गोपिता।।*' (४।३६) भ.पू.पा. शंकराचार्य योगतारावलीत म्हणतात. *नेत्रे ययोन्मेषनिमेषशून्ये वायुर्यया वर्जितरेचपूरः। मनश्च संकल्पविकल्पशून्यं मनोन्मनी सा मयि सन्निधत्ताम*।।१७।।. या श्लोकात या मुद्रेला मनोन्मनी आणि पुढे २१व्या श्लोकात अमनस्क मुद्रा असे तिलाच म्हणले आहे.३९.

**नादानुसंधान -** ही शांभवी मुद्रा लावून दृढ आसनावर बसून, दोन्ही अंगठ्यांनी कान, तर्जनींनी डोळे, मधल्या बोटांनी आणि उरलेल्या बोटांनी तोंड ही बिळे बंद केल्याने, उजव्या कानात नाद ऐकायला येतात. त्यांवर लक्ष केंद्रित केल्याने समाधीचा लाभ होतो. या नादांच्या *आरंभ*, घट, परिचय आणि निष्पत्ती अशा चार अवस्था हठयोगप्रदीपिकेच्या ४थ्या उपदेशात सांगितल्या आहेत. येथे श्रीस्वामिमहाराजांनी त्याचाच निर्देश केला आहे.

**त्रिग्रंथिभेदं -** प्रथम अनाहत चक्रातील रजोगुणात्मक ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हा सुषुम्णेत भूषणांच्या रुणझुणीसारखे नाद ऐकायला येतात. ही आरंभ अवस्था होय. या अवस्थेत कामक्रोधादि राजस भावांचा उपशम होतो. योग्याचे साधन प्रगत झाल्यावर जेव्हा प्राण कंठातील **विष्णुग्रंथी**चा भेद करतो तेव्हा भेरीसारखा आवाज उजव्या कानात ऐकायला येतो. हीच *घटावस्था.* यानंतर प्राण भ्रूमध्यात स्थिरावून तेथील रुद्रग्रंथीचा भेद करतो तेव्हा विशिष्ट वाद्याचा

**एतेनाष्टाङ्गयोगेन प्रबुद्धः स्वल्पसंविदा । शुभाशुभविनिर्मुक्तो देही ब्रह्ममयो भवेत् ।।४२।।**

एतेन स्वल्प+संविदा अष्ट+अङ्ग+योगेन प्रबुद्धः शुभ+अशुभ+विनर्मुक्तः देही ब्रह्म+मयः भवेत्।४२।

ध्वनी ऐकायला येतो. मग चित्तवृत्तीरूप आनंद मावळून स्वाभाविक आत्मानंद प्रकट होतो. ही तिसरी *परिचयावस्था.* तो या अवस्थेत योगी भूक, तहान, झोप, त्रिदोषजन्य दुःखे यांपासून मुक्त होतो. चौथ्या *निष्पत्ती* अवस्थेत प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिर होतो आणि बासरीच्या आवाजासारखा नाद उजव्या कानात ऐकायला येतो. हीच निष्पत्ती अवस्था. ह्यालाच राजयोग असे म्हणतात. या अवस्थेला पोचलेल्या योग्याला जगाची उत्पत्ती आणि लय करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. भ.पू.पा. शंकराचार्यांनी नादानुसंधानाने होणाऱ्या चित्ताच्या लयाला सर्वश्रेष्ठ लय मानले आहे. (*सदाशिवोक्तानि सपादलक्षलयावधानानि वसन्ति लोके। नादानुसंधानसमाधिमेकं मन्यामहे मान्यतमं लयानाम्।* योगतारावली ४)४०.

**अष्टांगयोग -** आतांपर्यंतच्या विवेचनांत श्रीमहाराजांनी आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही सहाच अंगे (**षट्क**) सांगितली आहेत. आता आणखी दोन अंगांचा विचार करून अष्टांगयोग संपूर्ण केला आहे. दहा प्रकारचा यम आणि दहा प्रकारचे नियम ही ती दोन अंगे. योगशास्त्रानुसार ते पुढीलप्रमाणे आहेत.

*अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः। दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश।*
*तपः संतोष आस्तिक्यं दानमीश्वरपूजनम्। सिद्धांतवाक्यश्रवणम् ह्रीमती च तपो हुतम्।*
*नियमा दश संप्रोक्ता योगशास्त्रविशारदैः।।*

पातंजल योगसूत्रात यम आणि नियम प्रत्येकी पाचच सांगितले आहेत. शांडिल्यादि इतर योगशास्त्रकारांनी आणि पुराणातही त्यांची संख्या वरीलप्रमाणे दहा दहा सांगितली आहे. यम हे दोषांपासून दूर राहण्यासाठी आहेत तर नियम हे गुणरूप आहेत. हे सामान्य मानव धर्माचे अंगभूत असल्याने कुणी कुणी यांना योगाची अंगे न मानता योगाला षडंगच म्हणतात.

## इदं रहस्यं परमं नाख्येयं यस्य कस्यचित् ।।४३।।

**।। इति योगाख्यं प्रथमं रहस्यम् ।।**

इदं परमं रहस्यम्। यस्य कस्यचित् न आख्येयम्।४३।

अर्थात् हे यमनियम योगाभ्यासाचा पायाच आहेत. योगाच्या सिद्धीनंतरही लोकसंग्रहासाठी यांचे अनुष्ठान आवश्यकच ठरते.४१. या स्वल्प म्हणजे सूक्ष्मस्वरूप परमेश्वराचे ज्ञान करून देणाऱ्या अष्टांगयोगाने ऐतरेय उपनिषदांत (१:३:१३) सांगितल्याप्रमाणे 'तोच हा पुरुष, ब्रह्म जीवमात्रांत व्याप्त आहे.' अशा ज्ञानाने प्रबुद्ध झालेला जीव शुभ आणि शुभ यांच्यापासून मुक्त होऊन ब्रह्मरूप होतो.४२.

**रहस्य -** ह्या अर्ध्या श्लोकात ग्रंथकारांनी हे रहस्य आहे आणि अनधिकारी माणसाला सांगू नये. असा आदेश दिला आहे. भगवद्गीतेतही (१८:६४) 'अर्जुना हे सर्व गुह्यांत गुह्यतम मी तुला सांगतो आहे.' असे स्पष्ट करून ते 'कधीही तपरहित, भक्तिहीन, सेवापराङ्मुख आणि परमेश्वराविषयी दोषदृष्टी ठेवणाऱ्याला सांगू नये' (६७) असा दंडक घातला आहे. हे सर्वच आध्यात्मिक ग्रंथांना लागू आहेच. इथे आणखी एक सूचना पुनरुक्तीचा दोष घेऊन करावीशी वाटते की हा ग्रंथ जिज्ञासूंना योगाची अंशतः तरी माहिती व्हावी या लोककल्याणाच्या भावनेने केला आहे. ह्यांत योगाची अनेक रहस्ये गुप्तच ठेवण्यात आलेली आहेत.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील योगरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ बोधरहस्यम् ।।

**सन्तप्त धन्य संन्यासिन् गुरुभक्त गतागतात् । मुक्त्या आत्माप्तये तत्त्व-जडचैतन्यविद्भव ।।१।।**

संतप्त धन्य संन्यासिन् गुरु+भक्त गत+आगतात् आत्म+आप्तये मुक्त्यै तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव।१।

श्रीगणेशाय नमः। कठोपनिषदांत (२:१:१) इंद्रिये बहिर्गामी असल्याने ती अंतरात्म्याला पाहू शकत नाहीत; त्यासाठी त्यांना आत वळवून मोक्षाच्या इच्छेने प्रत्यगात्म्याला एकादाच धीर पुरुष पाहतो (*कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्*). याचे दिग्दर्शन योगरहस्यात करून आता तिथेच (१:२:९) पुढे सांगितलेल्या 'ते दुसऱ्याकडूनच जाणून चांगले समजते' (*प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ*) या श्रुतिवाक्याचा भावार्थ व्यक्त करण्यासाठी हे बोधरहस्य केले आहे. योगरहस्यात सांगितल्याप्रमाणे योगाने मन-पवनांना स्थिर केल्यावर करावयाचा चित्ताच्या उपशमाचा, म्हणजेच आत्मज्ञानाचा अभ्यास बोधरहस्यात सांगितला आहे. बोध म्हणजेच ज्ञान आणि ज्ञानानेच मोक्ष म्हणजे निरतिशय आनंद - ज्यात सर्व दुःखांचा आत्यंतिक निरास अंतर्भूत आहे. हा सूत्रात्मक ग्रंथ श्रीस्वामिमहाराजांनी गुरु-शिष्यसंवादाच्या रूपात मांडलेला आहे. संवादात गुरुमहाराजच सांगत आहेत. शिष्याचे प्रश्न अपेक्षित किंवा अध्याहृत आहेत.

कुणी एक सुसंस्कृत ब्राह्मण वेदाध्ययन करून, गृहस्थाश्रमात विहित कर्मांचे आचरण करून आपल्या चित्तातील मलांचा निरास करून, परमेश्वराची उपासनाही करून दैवयोगाने त्रिविध तापांनी **संतप्त** होऊन वैराग्याने श्रीगुरूंना शरण आला. त्याची ती अवस्था पाहून कृपाळू भगवान् श्रीगुरू त्याला विचारीत आहेत.

**अधिकार -** पहिल्या श्लोकात शिष्याला उद्देशून चार संबोधने आहेत. त्या संबोधनांतून हा बोध घेण्याला शिष्य कसा योग्य आहे ते स्पष्ट होते. पहिले संबोधन आहे, '**संतप्त**'! म्हणजेच संसारांतल्या आध्यात्मिक, आधिभौतिक

आणि आधिदैविक अशा तीन प्रकारच्या तापांनी होरपळलेला! (आध्यात्मिक म्हणजे स्थूल शरीरातच निर्माण होणारी व्याध्यादि पीडा, व सूक्ष्म शरीरात होणारी दंभ-मद-मानादि आंतरपीडा, आधिभौतिक म्हणजे स्वशरीराहून भिन्न असणाऱ्या, प्रत्यक्ष परिदृश्यमानच चराचर जगापासून होणारी पीडा व आधिदैविक म्हणजे चर्मचक्षूला अदृश्य असणाऱ्या भूतप्रेतपिशाच प्रभृति शक्तींपासून होणारी पीडा.) अर्थातच ह्या संसाराच्या दुःखमयतेची खात्री पटलेला आणि त्यामुळे संसाराला उबगलेला. संसारातील सुखे कशी फसवी, क्षणभंगुर आणि दुःखपर्यवसायी आहेत हे मनांत बिंबल्याने ऐहिक किंवा पारलौकिक अशा सर्व सुखांच्या भोगांचा तिटकारा म्हणजेच वैराग्य (*इहामुत्रफलभोगविरागः*) उपजलेला. या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात सांगितलेला '*भवभ्रष्टमना*'. हा संसाराचा उबग किंवा वैराग्य हे कांही पूर्वपुण्याईवाचून येत नाही. याचा सविस्तर विचार योगवासिष्ठांत वैराग्य प्रकरणात पाहावा. अर्थातच ह्या वैराग्यावरून त्याची **धन्य**ता सिद्ध होते. हे वैराग्य हे ज्ञानाच्या चार साधनांचे उपलक्षण जाणावे. (साधनचतुष्टय - १. वैराग्य, २. विवेक, ३. शम-दम-श्रद्धा-तितिक्षा-उपरती-समाधान ही षट्संपत्ती आणि ४. तीव्र मुमुक्षा) गुरुमहाराज त्याला (हे) **संन्यासिन्** असे म्हणत आहेत. याचा अर्थ हा बोध घेणारा शिष्य संन्यासी असला पाहिजे. मग तो '*काम्यानां कर्मणां न्यासम्*' असा विद्वत्संन्यास असो की विविदिषा प्राप्तीनंतर घेतलेला विधिपूर्वक संन्यास असो.

पुढचे संबोधन **गुरुभक्त** असे आहे. सर्व जीवमात्रांत गुढरूपाने अवस्थित असणाऱ्या, मात्र गंभीर, अनिर्वचनीय आणि दुस्तर मायेच्या प्रभावाने अनुभवाला न येणाऱ्या परमाणूपेक्षाही सूक्ष्म आत्म्याचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर आपल्या बुद्धीनेच तर्क करून ते होणार नाही. ते दुसऱ्या ज्ञानी पुरुषांकडूनच मिळवावे लागते (कठ उ.२:९). श्रीमद्भागवतांत (११:३:२२) '*शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्*' अर्थात् ज्याला आत्म्याचे शाब्द - परोक्ष ज्ञानही आहे, जो साक्षात्कारी आहे आणि जो आत्मानंदातच रमलेला आहे अशा गुरूंकडूनच आत्मज्ञान प्राप्त होते. अशाच आत्मज्ञानी पुरुषांना संत म्हणतात. श्रीमदादिशंकराचार्य त्यांच्याविषयीच म्हणतात, '*शान्ता महान्ताः निवसन्ति संताः*

**स्वान्याज्ञं जडमन्या चिन्नामरूपात्मकं जडम् । रोमत्वङ्मांसनाड्यस्थि भुवोऽद्भ्यो मूत्ररेतसी ।।२।।**

स्वान्याज्ञं जडं (ज्ञेयम्) अन्या चित् (ज्ञेया) नामरूपात्मकं जडम्। रोमत्वङ्मांसास्थि भुवः (भवन्ति) मूत्ररेतसी स्वेदः अस्त्र+लाले च अद्भ्यः (भवन्ति)।२।

*वसंतवल्लोकहितं चरन्तः।*' परमार्थात सद्गुरूंच्या अनिवार्यतेची ग्वाही देणाऱ्या श्रुती, स्मृती, पुराणवचने आणि संतवचने किती तरी आहेत. अशा सद्गुरूंना शरण जाऊन त्यांचा आदर करून, त्यांची सेवा करून, त्यांना जिज्ञासू भावाने प्रश्न केल्यावर ते ज्ञानाचा उपदेश करतात असे भ.गीतेचेही वचन आहे (*तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः*।।४.३४।।). केवळ गुरूंकडे जाऊन काम होत नाही तर त्यांना शरण जाऊन त्यांची भक्ती केली पाहिजे असा अभिप्राय आहे. श्वेताश्वतर उपनिषदानुसार ज्याची देवावर भक्ती आहे, आणि देवासारखीच गुरूवरही भक्ती आहे त्या महात्म्याच्याच चित्तात हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील (*यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्येते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः*।।६.२३।।). भगवद्गीतेतही हे ज्ञान अभक्ताला सांगू नये असे म्हटले आहे.

**प्रयोजन -** अशा रीतीने ह्या चार संबोधनांतून त्या शिष्याने आत्मज्ञानप्राप्तीचा अधिकार संपादन केला आहे असे सूचित केल्यावर ग्रंथाचे प्रयोजन '**आत्म+आप्तये मुक्त्यै**' या शब्दांत सांगितले आहे. आत्म्याची प्राप्ती करून घेऊन जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे. शेवटी '**तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव**' या पदातून ह्या ग्रंथाचा विषय स्पष्ट केला आहे. इथे तत्त्वे म्हणजे सांख्ययोगातील प्रतिपादित तत्त्वे. यांची संख्या २५ असून पुढच्या साडेतीन श्लोकांत ती सांगितली आहेत. ह्या तत्त्वांचा अंतर्भाव जडातच होतो हे पुढे स्पष्ट करतील. ही तत्त्वे आणि जड काय आणि चैतन्य काय हे जाणणाराच आत्मज्ञान प्राप्त करून मुक्त होतो.१.

**स्वेदोऽस्रलालेग्रेः क्षुत्तृण्-निद्रा तन्द्रा रतिर्गतिः । लौल्यं निरोधः प्रसाराकुञ्चने मरुतोऽथ खात् ।।३।।**

(स्वेदः, अस्त्र+लाले (भवंति)) अग्नेः (सकाशात्) क्षुत्-तृट्-निद्रा-तंद्रा-रतिः (भवंति) मरुतः (सकाशात्) गतिः+लौल्यं+निरोधः प्रसार+आकुंचने (भवंति)। अथ खात्।३।

**जड -** प्रथम जडाची व्याख्या केली आहे. स्वतःला किंवा इतरांना जे जाणत नाही (**स्व+अन्य+अज्ञं**) ते जड. म्हणजे जाणीवरहित घटपटादि वस्तू म्हणजे जड. यापेक्षा वेगळे जाणीव असणारे ते चेतन (conscious) (**अन्या चित्**). जड हे दृश्य आहे तर चेतन ही दृक् (दृष्टी) आहे. तू, मी, असा प्रत्यय ज्याला येतो तो चेतन पदार्थ आहे. जड हे विषय आहेत तर चेतन विषयी आहे. जगात हेच दोन पदार्थ आहेत. चेतन पदार्थ मुख्य आहे व जड पदार्थ गौण आहेत. चेतन पदार्थ स्वतःसाठी (स्वार्थ) आहे व जड पदार्थ दुसऱ्यासाठी (परार्थ). असे हे जड आणि चेतन पदार्थ प्रकाश आणि अंधाराप्रमाणे परस्परविरुद्ध आहेत. जड वस्तू ह्या चेतनासाठी आहेत. जड हे नामरूपात्मक आहे हा दुसरा सिद्धांत आहे. याचाच अर्थ चेतन हे नामरूपातीत आहे.

आता आपल्याला चेतन वाटत असलेला हा देह हा कसा जड किंवा अचेतन आहे ते सांगत आहेत. त्यासाठी तो कसा पंचमहाभूतांचा बनलेला आहे त्याचे वर्णन केले आहे. प्रथम स्थूल देहाचे किंवा अन्नमय कोशाचे वर्णन आहे.

**पृथ्वी** या भूतापासून रोम, त्वचा, मांस, नाड्या आणि अस्थी झाल्या आहेत. हे पाच पदार्थ पृथ्वीसारखे कठीण आहेत. **जला**पासून मूत्र, वीर्य, घाम, रक्त आणि लाळ हे पाच पातळ, प्रवाही पदार्थ झालेले आहेत.२. **अग्नी**पासून क्षुधा, तृषा, निद्रा, तंद्रा (आळस) आणि रती म्हणजे मैथुन किंवा कांती. **वायू**पासून गती (हालचाल), निरोध, चांचल्य, प्रसरण, आकुंचन हे पाच होतात. **आकाशा**पासून(३) काम, क्रोध, लोभ, लोभ आणि भीती हे पाच.

**कामक्रुड्लोभमोहाभीस्-तदाढ्येयं जडा तनुः । वर्णाश्रमादिद्वन्द्वादि-संबन्धादिपरो भवान् ।।४।।**
**यन्निर्विकल्पं स्फुरति तदन्तःकरणं मनः । तत्सङ्कल्पविकल्पाभ्यां तत्तु धीर्निश्चयात्मकम् ।।५।।**

काम-क्रुड्-लोभ-मोहा+भीः (भवंति) तत्+आढ्या इयं जडा तनुः (अस्ति) भवान् वर्ण+आश्रमादि द्वंद्वादि संबन्धादि परः (अस्ति)।४।
- यन्निर्विकल्पं स्फुरति तत् अन्तःकरणम्। यत् संकल्प+विकल्पाभ्यां (उपलक्षितं) तन्मनः। यत्+निश्चय+आत्मकं तत्+चित्तम्।५।

अशा ह्या पाच भूतांच्या अंशापासून झालेल्या पंचवीस तत्त्वांचा हा जड किंवा स्थूल देह बनलेला आहे. वर्ण, आश्रम इत्यादि, तसेच सुख-दुःखादि द्वंद्वे, पिता, पुत्र इत्यादि संबंध हे या स्थूलदेहालाच आहेत. तू (या बोधरहस्यांत शिष्याला 'आपण' हे बहुमानार्थी संबोधनच वापरले आहे) यांच्या पलीकडे आहेस.४. तहान-भूक आदि प्राणाचे धर्म आणि काम-क्रोधादि मनाचे धर्म वर स्थूलदेहाच्या निरूपणांत आले आहे त्याचा अर्थ त्यांचे स्थूल देहावर होणारे परिणाम असा घ्यावा.

**सूक्ष्म देह -** 'मग ही सुख-दुखांची अनुभूती कुठून येते' याचे उत्तर साक्षी असा जो प्रत्यगात्मा त्याचे अंतःकरणाशी तसेच त्या अंतःकरणाचे स्थूल देहाशी झालेले तादात्म्य हेच आहे. त्या परस्परदेहांच्या तादात्म्यानेच सुख-दुःखांचे आभास होतात हे स्पष्ट करण्यासाठी प्रथम ते अंतःकरण वृत्तींसह सांगितले आहे. तूष्णी किंवा तटस्थ (आपण ज्याला सुन्न किंवा बधीर म्हणतो त्या) अवस्थेत किंवा समाधी अवस्थेत जे वृत्तीरहित स्फुरण होते ते **अंतःकरण** जाणावे. वृत्ती म्हणजे पाण्यावर जशा लाटा उद्भवतात तसे मनावर उठणारे तरंग. योगसूत्रात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, व स्मृती अशा पाच वृत्तींचे वर्णन आहे. त्याशिवाय सुख, दुःख, इच्छा, द्वेष इत्यादि वृत्तीही आहेत. अंतःकरण जेव्हा जाग्रत, स्वप्न या अवस्थात संकल्प आणि विकल्प वृत्तींनी व्यापले जाते तेव्हा त्याला **मन** ही संज्ञा प्राप्त होते. संकल्प म्हणजे एखादी गोष्ट चांगली वाटणे. ह्याच्यापासूनच काम म्हणजे इच्छा उद्भवते. विकल्प म्हणजे आधीच्या कल्पनेपेक्षा वेगळी कल्पना. तेच अंतःकरण एखाद्या गोष्टीचा निश्चय करते तेव्हा त्याला **बुद्धी** असे म्हणतात. उदाहरणार्थ 'गूळ गोड आहे', हा संकल्प आहे. तो आपल्याला अनिष्ट आहे हा विकल्प. हे मनाचे धर्म आहेत. विचारांती तो खाऊ नये असा निश्चय हा बुद्धीने केला जातो.५.

**अनुसन्धानकं चित्तमहङ्कारस्त्वहङ्कृतिः । व्यानाधार्याद्यं श्रुतेस्तु शब्दभुग्वक्ति वाक्सखम् ।।६।।**
**समानाधारि त्वचान्यत् स्पर्शयाशियादातृ दातृ च । उदानाधारा धीर्नेत्राद् रूपभुक्सगमागमा ।।७।।**
**जिह्वया प्राणवच्चित्तं रसभुग्रतिमूत्रकृत् । सापानाहङ्कृतिर्घ्राणाद् गन्धभुग्विड्विसर्गकृत् ।।८।।**

अनुसंधानकं चित्तम्। यत्+अहंकृतिः तत्+अहंकारः (उच्यते)। आद्यं तु व्यान+आधारि श्रुतेः शब्द+भुक् वाक्+सखं वक्ति।६।
अन्यत् समान+आधारि त्वचा स्पर्श+आशि आदातृ दातृ च उदान+आधारा धीः नेत्रात् रूप+भुक् स+गम+आगमा (भवति)।७।
प्राणवत्+चित्तं जिह्वया रस+भुक् रति+मूत्र+कृत् (भवति) स+अपान+अहंकृतिः घ्राणात् गंध+भुक् विड्+विसर्ग+कृत (भवति)।८।

अनु म्हणजे नंतर संधान ठेवणारे. अर्थात अनुभवानंतर त्याचे स्मरण करणाऱ्या अंतःकरणाला **चित्त** असे म्हणतात. तेच अंतःकरण जेव्हा 'मी' या वृत्तीने स्फुरते तेव्हा त्याला **अहंकार** म्हणतात. एकच अंतःकरण त्याच्या वृत्तींवरून पाच प्रकारे ओळखले जाते. म्हणून या पाचांना अंतःकरणपंचक असेही म्हटले जाते. हे पाच पृथ्व्यादि भूतांच्या सत्त्वगुणापासून झालेले आहेत. त्याच भूतांच्या सत्त्वगुणापासून ज्ञानेंद्रिये, रजोगुणापासून प्राण आणि कर्मेंद्रिये ही जड असूनही तू जो चेतन त्याच्या सान्निध्याने चेतनाप्रमाणेच भासतात आणि व्यवहारही करतात.

पहिले जे **अंतःकरण** ते **व्यान** वायूच्या आश्रयाने श्रोत्रेंद्रियांद्वारा (कानांनी) विविध वर्ण आणि विविध स्वर यांनी युक्त अशा **शब्द** या विषयाचा उपभोग घेते आणि **वाक्**इंद्रियाच्या द्वारां (वाचेने) शब्दांची उत्पत्तीही करते.६.

दुसरे जे **मन** ते **समान** वायूच्या आश्रयाने **त्वचा** (कातडी) **स्पर्श** या विषयाचा भोग घेते, आणि हातांच्या (**हस्त**) माध्यमातून देणे-घेणे या क्रिया करते.

तिसरी **बुद्धी** ही **उदान** वायूच्या आधारे **नेत्र** इंद्रियांनी (डोळ्यांनी) रूप हा विषय भोगते आणि **पाद** म्हणजे पायांनी जाण्यायेण्याच्या क्रिया करते.७.

**कर्मज्ञानेन्द्रियैः पुण्य-पापयोः सुखदुःखयोः। भौतिके पञ्चके कर्तृ-भोक्तृत्वे द्वन्द्वतापि च ।।९।।**
**तल्लिङ्गदेहतादात्म्यात् कर्तृत्वादि वृथार्जितम् । हेतुदेहपरस्वात्म-ज्ञानान्मुक्तिर्ध्रुवाऽचिरात् ।।१०।।**

भौतिके पंचके कर्म+ज्ञान+इंद्रियैः पुण्य+पापयोः सुख+दुःखयोः कर्तृ(त्व)+भोकृत्वे (भवतः) च द्वंद्वतापि (भवति)।९। तत् लिंग+देह+तादात्म्यात् (त्वया) कर्तृत्वादि वृथा अर्जितम्। हेतु+देह+पर+स्व+आत्म+ज्ञानात् अचिरात् मुक्तिः ध्रुवा (अस्ति)।१०।

चौथे **चित्त प्राण** वायूशी जुडून **जिह्वा** (रसना) या इंद्रियांने **रस** या विषयाचा आस्वाद घेते आणि **उपस्थ** (लिंग) या कमेंद्रियाने **रति** (मैथुन) आणि **मूत्रोत्सर्ग** या क्रिया करते.

शेवटचा **अहंकार अपान** वायूशी मिळून **घ्राण** (नाक) इंद्रियाने **गंध** (वास) या विषयाचा भोग करते आणि **गुद** इंद्रियांने **मलविसर्ग** करते. ८.

अशा रीतीने पंचधा अंतःकरण आणि पाच प्राण यांच्याद्वारा कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये पुण्य आणि पाप करतात; तेच पाच त्यांची फळे - सुख आणि दुःख, भोगतात; कर्मेंद्रियांकडे कर्तृत्व आणि ज्ञानेंद्रियांकडे भोक्तृत्व आहे. भूक-तहान, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वेही त्याच सूक्ष्मभूतांपासून झालेल्या पंचकाची - म्हणजेच लिंगदेहाची (सूक्ष्मदेहाची) आहेत. अन्नमय स्थूलदेहाशी त्यांचा संबंध नाही. कारण जेव्हां हा लिंगदेह मृत्यूच्या वेळी स्थूल देहापासून वेगळा होतो तेव्हा त्या अचेतन देहात कर्तृत्व-भोक्तृत्वादि राहत नाहीत.९. शीतोष्णादि द्वंद्वे तसेच कर्तृत्व-भोक्तृत्व हे जर लिंगदेहांशीं निगडित आहेत तर मग त्यांच्याशी तुझा कांहीच संबंध नाही हे स्पष्टच आहे. लिंगदेहाशी तादात्म्य झाल्याने, आपण लिंगदेह आहो या अध्यासाने तू उगीचच हे कर्तत्व-भोक्तृत्व स्वतःवर लादलेले आहे. 'तर मग ते कसे नष्ट करता येईल?' असे विचारशील तर ऐक. लिंगदेहाला तुझ्याशी जोडणारा जे कारणदेह (**हेतुदेह**) आहे त्याच्या पलीकडचे जे तुझे आत्मस्वरूप आहे त्याचे ज्ञान होताच तत्क्षणी तुझ्या कर्तृत्व-भोक्तृत्वांचा लोप होऊन तू कायमचा मुक्त होशील.१०.

**स्वदिदृक्षवरराज्ञान-हेतुसाक्षी परो भवान् । निराकारस्वात्मबुद्धि-महाकारणसाक्ष्यपि ।।११।।**
**स्थाणुरन्तर्बहिर्भास्वानात्मारामो निराकृतिः । चतुर्देहपरः साक्षी प्रत्यगीशोऽसि विद्ध्यदः ।।१२।।**

भवान् स्व+दिदृक्षुः+अरर+अज्ञान+हेतु+साक्षी परः असि। निराकार+स्व+आत्म-बुद्धि+महाकारण+साक्षी+अपि (असि)।११। स्थाणुः अन्तः+बहिः+भास्वान् प्रत्यक्+ईशः असि। अदः (मयोक्तं) विद्धि (येन) निः+आकृतिः निः+अभिमानः चतुः+देह+पर आत्म+आरामः च भविष्यसि।१२।

**कारणदेह -** आपल्या स्वरूपाला पाहू इच्छिणाऱ्याला दारासारखे अडवणारे अज्ञान आहे. हेच वर सांगितलेल्या स्थूल आणि लिंगदेहाचे बीज आहे. तेच सर्व ज्ञानाचा उपसंहार करून बुद्धीला आपल्या बीजात किंवा कारणात विलीन करते. हे रोजच झोपेच्या अवस्थेत आपण अनुभवतो. हाच कारणदेह. 'मग हाच आत्मा का म्हणू नये?' तर हा कारणदेह तमोगुणाने व्यापलेला आहे. झोपेतून उठल्यावर 'मी गाढ झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही' असे म्हणणारा तू त्या अज्ञानाला जाणणारा आहेस. तू त्याच्या पलीकडचा, स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा आणि त्यांचे अभिमानी, विश्व, तैजस् आणि प्राज्ञ यांचा साक्षी आहेस. साक्षात् पहाणारा म्हणजे **साक्षी**. असा तू आहेस. 'मी निराकार आत्मस्वरूप आहे' ही जाणीव म्हणजेच **महाकारणदेह**. इथेही सूक्ष्मरूपाने 'मी' ही जाणीव उरलेली असते. त्याच्याही पलीकडे तू आहेस. 'मग मी काय अभावरूपी (जड) आहे?' असे विचारशील तर तसे नाही. कारण त्या अंतिम वृत्तीचाही तू साक्षी आहेस. स्वयंप्रकाश आहेस.११.

**अन्नासुहृद्ध्यहङ्कार-मयतादात्म्यतो भ्रमः । स्थूलः पञ्चीकृतैर्भूतैः सूक्ष्मः कर्मेन्द्रियासुभिः ।।१३।।**
**धीन्द्रियैर्हेतुर्महांश्च तद्विदात्मन्यथोद्धृते । अन्वयव्यतिरेकाभ्यां परं ब्रह्मैव शिष्यते ।।१४।।**

अन्न+अस+हृद्+धी+अहंकार+मय+तादात्म्यतो भ्रमः (भवति)। पंचीकृतैः भूतैः स्थूलः, कर्म+इन्द्रिय+असुभिः सूक्ष्मः, धी+इन्द्रियैः हेतुः, महान् च (अस्ति) अथ तद्विदा अन्वय+व्यतिरेकाभ्यां आत्मनि उद्धृते परं ब्रह्म+एव शिष्यते।१३-१४।

एखाद्या स्तंभासारखा तू निष्क्रिय, निर्विकार आहेस. यालाच कूटस्थ (कूट = ऐरण) असेही म्हणतात. सोनाराच्या ऐरणीसारखा स्थिर, निष्क्रिय राहून त्यावर घडणाऱ्या अलंकाराशी कसलाही संबंध नसणारा. मात्र कूट जसा परिच्छिन्न - देश, काल, वस्तू आदींनी संकुचित असतो तसा तू नाहीस. तू आत आणि बाहेर प्रकाशमान आहेस. ज्ञानस्वरूप आहेस. हे तुझे मी केलेले वर्णन समजून घे, म्हणजे तू निराकार, निरभिमान, चारी देहांच्या पलीकडील आत्माराम होशील.१२.

**पंचकोश -** तुला असे वाटेल की मी सांगत असलेले जाणणे तुझ्या अनादिकालापासूनच्या भ्रमाने प्रभावित बुद्धीला कसे शक्य होईल? तर ऐक, स्फटिकाजवळ जर जास्वंदीचे फूल ठेवले तर तो स्फटिक लाल रंगाने रंगलेला दिसतो. तसेच कांहीसे तुझे या पंचकोशात्मक देहाच्या तादात्म्याने झालेले आहे. जास्वंदीचे ते फूल स्फटिकापासून बाजूला केले की त्याचे शुद्ध शुभ्र धवल स्वरूप स्पष्ट होते तसेच या पाच कोशांपासून धैर्याने आणि विवेकाने कठोपनिषदांतल्या वचनाप्रमाणे मुंज तृणांतून काडी काढावी तसे आत्मस्वरूप पृथक् केल्याने ('*अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा..*' २:६:१७) तुला ते जाणता येईल. यासाठी तुला आता पाच कोशांचा परिचय करून देतो. **अन्न**मय, प्राणमय (**असु**), मनोमय (**हृत्**), विज्ञानमय (**धी** = बुद्धी) आणि आनंदमय (**अहंकार**) हे ते पाच कोश आहेत. यांच्याशी तादात्म्य पावल्यानेच आपण आपल्याला जन्मादि विकारशील, तहान-भूक वगैरे द्वंद्वांनी प्रभावित, संकल्प-विकल्प करणारा, विज्ञानवान् कर्ता आणि आनंदवान् भोक्ता समजतो.

**भानं स्वप्नेऽस्योर्वभानेऽन्वयः प्राग्विस्मृतिः परः । लिङ्गाभानेऽन्वयः स्वाप-भानं प्राग्विस्मृतिः परः ।।१५।।**

स्वप्ने उरु+अभाने अस्य भानं अन्वयः, प्राक् विस्मृतिः परः(व्यतिरेकः)। लिङ्ग+अभाने स्वाप+भानं अन्वयः प्राक् विस्मृतिः परः।१५।

आता हे पाच कोश थोड्या विस्ताराने पाहू. पंचीकृत भूतांपासून झालेला हा स्थूलदेहच **अन्नमय कोश** आहे.१३.

रजोगुणापासून झालेल्या कर्मेंद्रिये आणि पांच प्राण यांचा मिळून सूक्ष्मदेहांतर्गत **प्राणमय** कोश होतो. सत्त्वगुणात्मक ज्ञानेंद्रिये आणि मन यांचा **मनोमय** कोश तसेच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धी यांचा **विज्ञानमय** कोश होतो. इथे श्लोकात मनोमयाचा अंतर्भाव विज्ञानमयात केला आहे. पाचवा **महान्** नावाचा **आनंदमय** कोश आहे. ह्या कोशांना जाणून, अन्वय आणि व्यतिरेक यांनी त्यांच्यापासून आत्मा बुद्धीने निवडून काढला की परब्रह्मच उरते.१४.

अन्वय म्हणजे अनुवृत्ती आणि व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ती. म्हणजे स्वप्नात असताना स्थूल देहाचे भान नसते. तरी हा अपरोक्ष आत्मा स्वप्न पहाणारा साक्षी असतोच. अर्थात् स्वप्नावस्थेत आत्म्याचा अन्वय (अनुवृत्ती) आहे. त्या वेळी आधीच्या स्थूलदेहाची विस्मृती होते. म्हणजेच स्वप्नावस्थेत स्थूलदेहाची व्यतिरेक (व्यावृत्ती) आहे. त्याचप्रमाणे जागेपणी सूक्ष्मदेहाची विस्मृती किंवा व्यतिरेक असतो. पण साक्षी आत्मा इथेही असतोच. म्हणजे त्याचा अन्वय आहेत. गाढ झोपेच्या अवस्थेत स्थूल देह आणि लिंगदेह या दोहींचे पूर्ण विस्मरण होते. अर्थात् त्यांचा व्यतिरेक आहे. त्या वेळी कसलेच ज्ञान नसले तरी झोपेतून उठल्यावर 'मी सुखाने झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही,' असे त्याला आठवते. याचा अर्थ त्या अज्ञान आणि आनंदमय अवस्थेचा अनुभव घेणारा तिथे होताच. त्याशिवाय त्याला ते कसे आठवले असते? म्हणजे या अवस्थेतही आत्मा साक्षित्वाने आहे.१५.

**तद्विदोऽसुमनोध्याख्या गुणावस्थाभिदः पृथक् । सुप्त्यभानेऽन्वयो भानं समाधौ प्राग्वदन्यकः ।।१६।।**
**त्यक्तत्रिदेहसङ्गस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् । स्थितिः परात्परं वस्तु सच्चिच्छर्म निराकृति ।।१७।।**

समाधौ सुप्ति+अभाने (अस्य) भानं अन्वयः अन्यकः प्राग्वत्। गुण+अवस्थाभिदः असु-मनो-धी+ आख्या तद्विदः पृथक् (कृताः)।१६।
त्यक्त+त्रि+देह+संगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् स्थितिः (तदेव) परात्परं निराकृति सत्+चित्+शर्म वस्तु (अस्ति)।१७।

पंचकोशांचे निरूपण चाललेले असता देहाचा अन्वय-व्यतिरेक यांचा विचार असंगत वाटण्याचे कारण नाही. स्थूलदेह हाच अन्नमय कोश आहे; सूक्ष्मदेहात प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय कोश अंतर्भूत आहेत. कारणदेहच प्रिय-मोद-प्रमोद या वृत्तींसहित आनंदमय कोश आहे. प्रिय म्हणजे इष्ट वस्तूचे दर्शन, मोद म्हणजे त्याचा लाभ आणि प्रमोद त्याची अनुभूती अशा ह्या आनंदमय कोशातील वृत्ती आहेत. इथे एकाच लिंग(सूक्ष्म)देहात तीन कोश (प्राण, मन आणि विज्ञान) गुण आणि अवस्था यांच्या भेदाने होतात. राजस कर्मेंद्रिये आणि प्राण यांच्यापासून प्राणमय कोश; ज्ञानेंद्रिये, मन आणि बुद्धी हे तीनही सत्त्वगुणात्मकच असले तरी बाह्य आणि अंतर अवस्थांमुळे दोन कोश होतात. बहिर्मुख इंद्रिये आणि मन यांचा मनोमय कोश आणि अंतर्मुख इंद्रिये आणि बुद्धी यांचा विज्ञानमय कोश. समाधीच्या अवस्थेत सुषुप्तीचेही भान नसते. जागृती आणि स्वप्न या अवस्थांची स्थूल आणि सूक्ष्म देहांसह जाणीव हरपलेली असते. पण समाधीच्या साक्षित्वाने आत्म्याचा अन्वय मात्र इतर अवस्थांसारखाच तिथेही असतोच.१६. अशा रीतीने अन्वय आणि व्यतिरेकाच्या माध्यमांतून पंचकोशांचा विवेक केल्याने स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा अभिमान, संग किंवा लाग टाकून जी कल्पनारहित सुषुप्तीसारखी (सुषुप्ती नव्हे) स्थिती हेच श्रेष्ठतम, निराकार, सच्चिदानंद परब्रह्म आहे. 'हा आत्माच ब्रह्म आहे' हे श्रुतिवचन (मांडूक्य उ. २) यालाच अनुलक्षून आहे.१७. बीजात लीन झालेला वृक्ष जसा भूमी, पाणी आणि ऋतू यांमुळे अंकुरतो व दृश्यमान होतो, त्याचप्रमाणे सुषुप्ती अवस्थेतील अज्ञानात लीन झालेले जगत् आणि देह अज्ञानी जीवाला जागृत अवस्थेत पुनश्च प्रकटून अनुभवाला येतात.

**क्ष्माप्कालैर्बीजलीनद्रुर् यथेक्ष्यो जागृतेस्तथा । सुप्त्यवित्स्थजगद्देहौ तत्परत्वाविदः पुनः ।।१८।।**
**देहान्ते ज्ञस्याहंतास्थ-विश्वाकारोऽनुजन्मदः । अवस्था जागृतिः स्वप्नो निद्रा तुर्या च तुष्टये ।।१९।।**

बीज+लीन+द्रुः क्ष्म+अप्+कालैः यथा ईक्ष्यो (भवति) तथा सुप्ति+अवित्+स्थ+जगत्+देहौ तत्परत्व+अविदः जागृतेः पुनः (ईक्ष्यौ भवतः)।१८। अज्ञस्य देहान्ते अहंता+स्थ+विश्व+आकारः अनुजन्मदः (भवति)। जागृति, स्वप्न, निद्रा, तुर्या च तुष्ट्य अवस्था (ज्ञेयाः)।१९।

सुषुप्ती अवस्थेतील अज्ञान हाच कारणदेह आहे आणि जागृत अवस्थेतील देह आणि जग यांचे तेच बीज आहे असा भावार्थ.१८. जगाचा पसारा स्थूलदेहासहित अज्ञानरूपी बीजात - कारणदेहात लीन होणे आणि झोपेची स्थिती संपल्यावर तो पुनश्च प्रकटणे या दैनंदिन क्रिया आहेत. देहांताच्या वेळी केवळ स्थूल देहाचा नाश होतो. मात्र त्याचा **विश्व** नावाचा अभिमानी तसाच राहतो. त्यात हा विश्वाकार किंवा जगादाकार असतो. झाडाची फांदी तोडल्यावर जसे तिथेच पुन्हा नवी फांदी फुटावी तसा या विश्वाकारापासून नवा जन्म येतो. हा अहंकार केवळ ज्ञानानेच जात असल्याने ज्ञानाभ्यास हा एकच मोक्षाचा उपाय आहे. त्यानेच या चारही देहांचा प्रविलाप म्हणजे पूर्ण लय होतो. त्यासाठी या देहचतुष्टयाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. ते पुढील तालिकेत दिले आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण या देहांचे क्रमशः विषय, स्वप्न, निद्रा आणि समाधिज हे आनंद आहेत.१९. नेत्र, कंठ, हृदय आणि मस्तक ही स्थाने आहेत. विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यक् हे अभिमानी आहेत. स्थूल, सूक्ष्म (प्रविविक्त), मुद आणि उन्मुद (परानंद) हे भोग आहेत.२०. रज, सत्त्व, तम आणि शुद्धसत्त्व हे गुण आहेत. वैखरी, मध्यमा, पश्यन्ती आणि परा या वाचा आहेत.२१. तीन अवस्थात त्याच क्रमाने ॐकाराच्या तीन मात्रा (अ, उ, म) आहेत आणि तुर्यावस्थेत (महाकारण देहात) अर्धमात्रा आहे.

**विश्वतेजःप्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिताः । दृक्कण्ठहृन्मूर्धसंस्थाः स्थूलसूक्ष्ममुदुन्मुदः ।।२०।।**
**भोगा रजःसत्त्वतमः-शुद्धसत्त्वगुणाः क्रमा । वाचोऽत्र वैखरी मध्या पश्यन्ती च परास्त्रिषु ।।२१।।**
**त्रिमात्रा ॐकृतेस्त्वर्धा तुर्ये ज्ञात्वैवमादितः ।**

दृक्+कंठ+हृत्+मूर्ध+संस्थाः विश्व+तेजः+प्राज्ञ+प्रत्यक्+अभिमानिनः ईरिताः। स्थूल+सूक्ष्म+मुद्+उन्मुदः (क्रमेण एषां) ईरिताः।२०। रजः+सत्त्व+तमः शुद्धसत्त्वगुणाः क्रमात् गुणा (ज्ञेयाः) अत्र क्रमात् वैखरी+मध्या+पश्यंती परा च वाचो (ज्ञेयाः)।२१। त्रिषु त्रिमात्रा ॐकृतेः+तु+अर्धा तुर्ये।

### चार देह, त्यांच्या अवस्था, अभिमानी, स्थान इत्यादींची तालिका

| देह | अवस्था | अभिमानी | स्थान | आनंद | भोग | गुण | वाचा | देव | लोक | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थूल | जागृत | विश्व | नेत्र | विषयानंद | स्थूल | रज | वैखरी | ब्रह्मा | भूः | अः |
| सूक्ष्म | स्वप्न | तैजस | कंठ | स्वप्नानंद | प्रविविक्त | सत्त्व | मध्यमा | विष्णु | भुवः | उः |
| कारण | निद्रा | प्राज्ञ | हृदय | निद्रानंद | आनंद | तम | पश्यंती | रुद्र | स्वः | मः |
| महाकारण | तुर्या | प्रत्यक् | मूर्धा | समाध्यानंद | परानंद | शुद्धसत्त्व | परा | आत्मा | महः | अर्धमात्रा |

हे सर्व सविस्तर जाणून घेऊन प्रथम स्थूल देहाचा सूक्ष्म देहात लय करावा. त्या सूक्ष्म देहाचा लय कारणदेहात करावा. त्याचा लय महाकारण देहात केल्यावरच आनंदरूप होऊन स्वरूपात स्थिरावतो. दुसरा कांहीच उपाय नाही. **लय** म्हणजे त्या त्या देहाची आत्यंतिक विस्मृती. सामान्य माणूसही एखाद्या क्रियेत गढून गेला की त्याला देहाची विस्मृती होते; कधी कधी तहान-भूकही हरपतात. संगीताच्या प्रभावाने शरीराचे व मनाचेही दुःख माणूस विसरतो. हेच ज्ञानाभ्यासाच्या वा योगाभ्यासाच्या प्रक्रियेने साधता आले पाहिजे.२२.

**स्थूलः सूक्ष्मे कारणे तत् तन्महाकारणे क्रमात् । प्रविलाप्यानन्दमयः स्वस्थो भवति नान्यथा ॥२२॥**
**तस्माद्देहत्रये लीने धीलयः स समाधिकः । तत्ते परात्परं रूपं निर्विकल्पमवेहि सत् ॥२३॥**
**घटादिवद्द्योर्जीवस्याविद्योपाधिस्तु तत्क्षये । खस्थद्योवत्परात्मत्वं जीवत्वं लीयतेऽचिरात् ॥२४॥**
**ज्ञाते क्षराक्षराहंता-परे तत्त्वे स तन्मयः । सृष्टेः प्राङ्निर्विकल्पैका चिद्ब्रह्मास्मीत्यभूत्त्विह ॥२५॥**

एवं आदितः ज्ञात्वा स्थूलः सूक्ष्मे तत् कारणे तत् महाकारणे क्रमात् प्रविलाप्य आनंदमयः स्वस्थो भवति अन्यथा न।२२। तस्मात् देह+त्रये लीने धी+लयः सः समाधिकः। तत् ते परात् परं सत् निर्विकल्पं रूपं अवेहि।२३। द्योः घट+आदि+वत् जीवस्य तु अविद्या उपाधिः तत्+क्षये ख+स्थ+द्यो+वत् परात्मत्वं (भवति)। जीवत्वं अचिरात् लीयते।२४। क्षर+अक्षर+अहंता+परे तत्त्वे ज्ञाते स तन्मयः (भवति)। सृष्टेः प्राक् एका निर्विकल्पा चित् (आसीत्) इह तु ब्रह्म+अस्मि+इति स्फूर्तिः अभूत्।२५।

अशा रीतीने तीनही देहांचा लय केल्याने प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्त्याकार बुद्धीचाही लय होतो. तीच समाधी होय. तेच तुझे परात्पर, निर्विकल्प सत् रूप आहे हे जाण.२३. आकाशाच्या जशा घट आदि उपाधी आहेत तशीच जीवाची अविद्या ही उपाधी आहे. घटाचा नाश होताच त्याने सीमित झालेले आकाश जसे महाकाशच होऊन जाते तसेच अविद्येची उपाधी नष्ट झाली की जीवदशा संपते आणि मूळचा परमात्मभाव प्राप्त होतो.२४. क्षर म्हणजे सर्व भूतमात्र, अक्षर म्हणजे कूटस्थ (आत्मा) आणि अहंता म्हणजे त्रिदेहरूपी संघाचा अभिमान. या तीन्हींच्या पलीकडले तत्त्व जाणणारा..

**स्फूर्तिः खे वायुवत्साद्या मायाद्यस्तज्ज्ञ ईश्वरः । तत्र विश्वोद्गमेहाभूत्साऽन्या मायाथ तत्र तु ।।२६।।**
**जगत्स्यामिति सङ्कल्पोऽभून्महत्तत्त्वनामकः । विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेशजीवकौ ।२७।।**
**जीवोऽविद्याऽऽवृतः स्वाज्ञो महतोऽहंकृतिस्त्रिधा । क्रियाज्ञानद्रव्यशक्ति-रजःसत्त्वतमोगुणैः ।।२८।।**
**प्राणेन्द्रियान्तःकरण-भूतान्यासन्क्रमात्ततः । ततो लोका विराट् तैश्चिदंशात् कार्यक्षमोऽभवत् ।।२९।।**
**लोकाङ्गस्य रदास्तारा माया हास्यं निशादिने । निमेषोन्मेषौ कटाक्षः सृष्टिः कुक्षिरपांपतिः ।।३०।।**

खे वायुवत् स्फूर्तिः सा आद्या माया तज्ज्ञ ईश्वरः। तत्र विश्व+उद्गम+इहा अभूत् सा अन्या माया अथ तु तत्र जगत्+स्याम्+इति संकल्पो महत्+तत्त्व+नामकः अभूत्। विद्या+अविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेश जीवकौ (ज्ञाते)।२६-२७। अविद्या+आवृतः स्व+अज्ञः जीवः महतः+अहंकृतिः त्रिधा। रजः+सत्त्व+तमो+गुणैः क्रिया+ज्ञान+द्रव्य+शक्तिः (अभूत्)।२८। ततः क्रमात् प्राण+इन्द्रिय+अन्तः करण-भूतानि आसन्। ततः लोकाः (आसन्) विराट् चित्+अंशात् तैः कार्यक्षमः+अभवत्।२९। लोक+अंगस्य तारा रदाः माया हास्यं निशा+दिने निमेष+उन्मेषौ कटाक्षः सृष्टिः अपां पतिः कुक्षिः।३०।

..त्या तत्त्वाशी एकरूप होतो. ते स्पष्ट करण्यासाठी उपक्रम आणि उपसंहार यांचे वर्णन केले आहे.

**उपक्रम -** सृष्टीच्या पूर्वी कल्पनारहित, एकच एक असे चैतन्य होते. शांत निश्चल आकाशात एखादी वायूची लहर उठावी तशा त्या ब्रह्मात 'मी ब्रह्म आहे' अशी वृत्ती निर्माण झाली.२५.

ही जी हवेच्या लहरीसारखी स्फूर्ती झाली तिलाच **आदिमाया** म्हणतात. तिचा ज्ञाता ईश्वर आहे. ह्या सर्वज्ञ, सर्वकर्तृत्ववान् ईश्वराला विश्वाची निर्मिती करावी अशी इच्छा झाली. ही दुसरी माया होय. ही मलिनसत्त्वोपाधिक **अविद्या माया**. तिच्या ठायी 'जगत् व्हावे' असा जो संकल्प झाला त्यालाच **महत् तत्त्व** असे नाव आहे. विद्या माया आणि तिचा ज्ञाता - तिच्यांत प्रतिबिंबित झालेले चैतन्य, हा **सर्वेश्वर**. दुसरी मलिनसत्त्वोपाधिक अविद्या माया आणि

**नाड्यो नद्यो द्रुमाः केशा वृष्टी रेतोऽस्थि पर्वतः । विराजः स्थूलदेहोऽयं चराचरजगन्मयः ।।३१।।**
**दिग्वाय्वर्कप्रचेतोऽश्वि-वह्नीन्द्रोपेन्द्रमृत्युकाः । ज्ञानकर्मेन्द्रियाण्यन्तःकरणानि हरिः शशी ।।३२।।**

नद्यो नाड्यः, द्रुमाः केशाः, वृष्टिः रेतः, पर्वतः अस्थि, (एवं) चराचर+जगत्+मयः अयं विराजः स्थूलदेहः (ज्ञेयः)।३१। दिक्+वायु+अर्क+प्रचेतः+अश्वि+वह्नि+इन्द्र+उपेन्द्र+मृत्यकाः ज्ञान+कर्म+इन्द्रियाणि (बोध्यानि)। हरिः शशी ब्रह्म+नारायण+ईशाः च अन्तःकरणानि। (एवमयं) विराजः सूक्ष्मदेहः।३२।

तिच्यांत प्रतिबिंबित होणारा तिचा ज्ञाता जीव. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, स्वतंत्र, विभू आहे तर जीव अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, परतंत्र आणि परिच्छिन्न आहे.२६-२७. अविद्येने आवृत (झाकलेला) हा जीव स्वतःला जाणत नाही. आदि जीव म्हणजेच ब्रह्मा किंवा हिरण्यगर्भ होय. हा समष्टीचा सूक्ष्म देह आहे. महत्तत्त्वापासून त्रिविध अहंकार झाले. रजोगुणात्मक क्रियाशक्ती, सत्त्वगुणात्मक ज्ञानशक्ती आणि तमोगुणात्मक वस्तुशक्ती असे ते तीन अहंकार होत.२८. राजस अहंकारापासून कर्मेंद्रिये आणि प्राण झाले. सात्त्विक अहंकारापासून पाच ज्ञानेंद्रिये, अंतःकरणपंचक आणि त्यांच्या देवता झाल्या. तामस अहंकारापासून पृथिवी, आप इत्यादि पंच महाभूते झाली. त्या भूतांपासून चतुर्दश भुवने (लोक) झाले. ते असे भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक (स्वर्ग), महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे वरचे सात लोक आणि अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हे सप्तपाताल लोक झाले. त्या लोकांपासून विराट् पुरुष प्रकट झाला. त्या विराटांत चैतन्याचा अंश (चिदंश) प्रवेशल्याने तो कार्यक्षम झाला. हा विराट् समष्टी स्थूलदेह आहे.२९.

**विराट् -** हे चौदा लोकच ज्याचे अवयव आहेत अशा त्या विराटाचे नक्षत्र हे दात आहेत, माया हास्य आहे, रात्र आणि दिवस निमेषोन्मेष आहेत, त्याच्या कटाक्षाने सृष्टी होते, सागर हा त्याची कूस आहे.३०.

**ब्रह्मनारायणेशाश्च सूक्ष्मदेहोऽथ कारणम् । अविद्याऽद्या महत्प्रत्यगीशो देहनिरासतः ।**
**तत्पदं व्यतिरेकात्त्वं-पदं तत्त्वमसि ह्यतः ।।३३।।**
**भूरप्स्वग्नौ ताः स वायौ स खे तत्प्रविलापयेत् । द्रव्ये तमसि तत्सत्त्वे रजः सत्त्वं तमस्यथ ।।३४।।**
**अहंकृतौ तन्महति साविद्यायां लयो द्वयोः । साद्यायां सा ब्रह्मणीत्थं त्वंपदं व्यतिरेकतः ।।३५।।**

अथ अविद्या कारणं, आद्या महत्कारणं, ईशः (एव) प्रत्यक्, व्यतिरेकात् देह+निरासतः त्वपदं (इव) तत्पदं, अतः हि तत् त्वम् असि।३३। भूः अप्सु, ताः अग्नौ, स वायौ, स खे, प्रविलापयेत्। तत् द्रव्ये तमसि, तत् (तमः) रजः सत्त्वे, सत्त्वं तमसि, तत् (तमः) अहंकृतौ, (सा) महति, (स) (महान्) अविद्यायां, द्वयोः (अपि) लयः, सा आद्यायां, सा ब्रह्मणि, इत्थं व्यतिरेकतः त्वं पदं (बोध्यम्)।३४-३५।

नद्या त्या विराटाच्या नाड्या आहेत, वृक्ष त्याचे केस आहेत, वृष्टी रेत आहे, पर्वत अस्थी आहेत. असा हा चराचर जगत्स्वरूप विराट् ह्याला (समष्टीचा) स्थूलदेह जाणावा.३१.

**हिरण्यगर्भ -** दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इन्द्र, उपेन्द्र आणि यम ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. (क्रमशः कान, त्वचा, नेत्र, रसना, नासिका, वाणी, हात, पाय, गुद आहेत. प्रजापती ज्याचे उपस्थ आहे.) समष्टीची इंद्रिये ही व्यष्टीच्या (जीवाच्या) इंद्रियांच्या देवता आहेत. जीवाच्या इंद्रियांची कार्यक्षमता ही समष्टीच्या इंद्रियरूप देवतांच्या अनुग्रहावर अवलंबून आहे. हरी त्याचे अंतःकरण आहे तर चंद्र मन आहे.३२. ब्रह्मदेव त्याची बुद्धी आहे आणि रुद्र अहंकार आहे. हा विराट पुरुषाचा (समष्टीचा) सूक्ष्म देह होय. यालाच हिरण्यगर्भ किंवा सूत्रात्मा असेही म्हणतात. अविद्या हा समष्टीचा कारण देह आहे तर आदिमाया (विद्यामाया) महाकारण देह आहे. ईश्वर हा समष्टीचा प्रत्यगात्मा आहे. वर ज्याप्रमाणे जीवाच्या तीन देहांचा निरास किंवा लय करून त्याचे प्रत्यक् स्वरूप सिद्ध केले, त्याच प्रकारे समष्टीच्या तीन देहांचा (विराट, हिरण्यगर्भ आणि अविद्या माया) लय केला की जीवाचे ईश्वराशी

**व्याख्यारूपैकसद्वस्तु सृष्टेः प्राक् चाधुनापि तत् । त्वं श्रोत्रात्मेन्द्रियातीतमस्यैक्यमनुभूयताम् ॥३६॥**
**सृष्टेः प्राक् सच्चिदानन्द-रूपोऽद्याहङ्कृतेर्लयात् । प्राग्वदूर्ध्वमपीदृक्त्वं या सृष्ट्यस्तित्वकल्पना ॥३७॥**
**गवाधाराहङ्कृतेः प्राक्-स्थानाभावान्न साद्य चेत् । तद्वत्क्वास्ति त्वमेकोऽतोऽद्वितीयो ब्रह्म चिन्मयः ॥३८॥**

व्याख्या+रूप+एकसत्+वस्तु (यत्) सृष्टेः प्राक्+अधुना+अपि तत्। श्रोत्र+आत्म+इन्द्रिय+अतीतं त्वं असि। ऐक्यं अनुभूयताम्।३६। सृष्टेः प्राक् त्वं सच्चिदानन्दरूपः (आसीः)। अद्य अहंकृतेः लयात् प्राक् वत् सच्चिदानंदरूपः (असि)। ऊर्ध्वं अपि ईदृक (भविष्यसि)। अहंकृतेः प्राक् या सष्टि+अस्तित्व+कल्पना सा गो+आधारा अद्य न। चेत् तद्वत् क्व अस्ति? अतः त्वं एकः अद्वितीयः चिन्मयः ब्रह्म (असि)।३७-३८।

ऐक्य सिद्ध होते. 'तो तू आहेस' या महावाक्यातील 'तू' या पदाने (*त्वंपदाने*) लक्षिलेल्या जीवाची, 'तो' या पदाने (*तत्पद*) दर्शविलेल्या ईश्वराशी एकरूपता आहे हा निश्चय होतो.३३.

**उपसंहार -** आता हा निरास कसा करायचा ते सांगत आहेत. पृथ्वीचा लय जलात करायचा; त्या जलाचा लय तेजात (अग्नीत) करायचा; तो अग्नी वायूत विलीन करायचा; आणि वायूचा आकाशात लय करायचा. ते आकाश द्रव्यात्मक तमोगुणात विलीन करायचे. मग तमोगुणाचा (अहंकारातील) रजोगुणात, रजोगुणाचा (अहंकारातील) सत्त्वगुणात आणि सत्त्वगुणाचा (अहंकारातील) तमोगुणात लय करावा.३४. तो तमोगुण अहंकारात लीन करून अहंकाराचा लय अविद्यामायेत करावा. अशा रीतीने विराजाच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांचे प्रविलापन होते. मग अविद्यामायेचा लय आदिमायेत आणि तिचा लय ब्रह्मात करावा. अशा रीतीने सर्व विलापांची सीमा जे ब्रह्म तेच उरते. ते व 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ आहे. याच प्रकारने देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी यांचा विलय करून उरलेला जो प्रत्यगात्मा तोच 'त्वं' पदाने लक्षिलेला आहे.३५.

**ब्रह्मबुद्ध्या द्वयाभावाद् देह्यहंकृतिसंक्षयात् । शिष्यतेऽत्र निराकारः क्वाख्यारूपात्मकं जगत् ।।३९।।**
**स्रग्भोगिवद्दृष्टमपि ज्ञानदीपान्न ते भ्रमः । ज्ञानं त्यक्त्वा दृढाभ्यासी भ्रमेणापि न युज्यते ।।४०।।**

ब्रह्म+बुद्ध्या अहंकृति+संक्षयात् द्वय+अभावात् अत्र देही निराकारः शिष्यते। आख्या+रूपात्मकं जगत् क्व?।३९। स्त्रक्+भोगि+वत् दृष्टं अपि (जगत्) ज्ञान+दीपात् ते भ्रमः न। दृढ+अभ्यासी ज्ञानं त्यक्त्वा अपि भ्रमेण न युज्यते।४०।

**तत्त्वमसि -** या दोहोंचे ऐक्य दाखविण्यासाठी महावाक्याचे आता निरूपण करीत आहे. नाम आणि रूप यांच्या पलीकडील एकमेवाद्वितीय (सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदांनी रहित) जी वस्तू सृष्टीच्या पूर्वीही होती, आज स्थितीच्या काळातही आहे आणि प्रलयानंतरही राहणारच आहे.

छांदोग्यात (*वाचारंभणं विकारो नामधेयम्।* ६:१:४)) सोन्याच्या विविध अलंकारांची नावे जरी वेगळी असली तरी त्यातील सोन्यात कांहीच फरक नसतो, या दृष्टांताने संपूर्ण चराचर जगत हे एकाच ब्रह्माचे विकारभूत आहेत. त्याची नावे जरी वेगवेगळी असली तरी ती बोलण्यासाठी आहेत. ब्रह्मस्वरूपात कांही फरक पडत नाही. तसेच बृहदारण्यक उपनिषदांत (३:४:२) 'याच्याशिवाय इतर सर्व दुःखमूलक- नाशिवंत आहे.' असे म्हटले आहे. ह्या श्रुती याच ब्रह्मवस्तूचा निर्देश करतात. हेच 'तत्'पदाचे लक्ष्य आहे. हे ऐकणारा जो तू आहेस त्याचा देह, इंद्रिये, मन, बुद्धी आदींच्या संघाताच्या पलीकडचा आहेस. त्यांच्या प्रविलापनाने उरलेले जे प्रत्यक्, साक्षी चैतन्य आहे तेच 'त्वं'पदाचे लक्ष्य आहे. या महावाक्यांत या दोन्ही पदांची 'असि' या पदाने समानता प्रतिपादली आहे. याच्या अखंडत्वाने हे दोन्ही - जीव आणि परब्रह्म, 'तेच तू' आणि 'तूच ते' अशी एकरस एकरूपता तुला निदिध्यासनादि क्रमांनी अपरोक्षतया (प्रत्यक्ष) अनुभवायची आहे.३६. सृष्टीच्या पूर्वी तू सच्चिदानंदस्वरूप होतास. आता अहंकाराचा लय झाल्यावर आणि तुझ्या सर्व उपाधी गळून पडल्यावर तू पूर्वीसारखाच सच्चिदानंदरूप आहेस. यानंतरही - विदेह कैवल्यानंतरही असाच सच्चिदानंदरूप राहणार आहेस. अर्थात् तू एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहेस. शिष्याच्या मनांत

**स्रज्यह्यभावः प्रागूर्ध्वं तद्वद् ब्रह्मणि चास्य तु । अभावाच्छून्यता मैहि तज्ज्ञ सच्चित्सुखात्मक ।।४१।।**
**भास्वान्नित्यः प्रबोधोऽयं वेदा भ्रान्तहितैषिणः । साधकान्यद्य कार्याणि साध्याभावान्न कुर्वतः ।।४२।।**

यथा स्रजि अहि+अभावः तद्वत् प्राक् ऊर्ध्व च ब्रह्मणि अस्य तु (अभावः) तत्+ज्ञ सच्चित्सुखात्मक अभावात् शून्यता मा एहि।४१।
अयं प्रबोधः भास्वान् नित्यः (अस्ति)। वेदाः भ्रान्त+हितैषिणः (सन्ति) अतः साधकानि कार्याणि। अद्य साध्य+अभावात् न कुरु।४२।

अशी शंका आहे की, 'ही माझ्याहून वेगळी अशी सृष्टी मला प्रत्यक्ष दिसते आहे, अनुभवाला येते आहे तर मग मी अद्वितीय कसा असेन?' गुरुमहाराज सांगत आहेत, 'पूर्वी इंद्रियादींच्याविषयी अध्यासाने जो अहंकार होता त्याच्या आधाराने सृष्टीच्या अस्तित्वाची कल्पना होती. पण आता तुला ज्ञान झाले असल्याने तुला सर्व कांही इंद्रियादिक आत्ममयच झाले आहे. त्या सृष्टीच्या अस्तित्वाच्या कल्पनेला आता आधारच राहिला नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) सांगितल्याप्रमाणे सर्व कांही एकरूपच झाले आहे. मग कोण कुणाला पाहील, कोण कुणाला जाणील?'३७. आता पूर्वीसारखी सृष्टी शोधूनही सापडणार नाही. अंधारात भासलेला साप, दिवा आणून पाहिल्यावर, आणि ती दोरी असल्याचे जाणल्यावर, पुन्हा हुडकूनही सांपडणार नाही. तो ना कधी होता, ना आता आहे, ना पुढे कधी असेल.३८. बुद्धीची वृत्ती अखंडतया ब्रह्माकार झाली की निराकार स्वरूपच उरते. तिथे नामरूपात्मक जगत् कुठे असणार?३९. भोगकाळामध्ये कदाचित् कधी माळेवर भासणाऱ्या सापासारखा जगाचा भास जरी तुला झालाच तरी आता ज्ञानदीप तेवत असल्याने तो भ्रम टिकणार नाही. 'मग हा ज्ञानदीप किती काळपर्यंत राखून ठेवायचा' असे विचारशील तर 'अभ्यास दृढ होईपर्यंत' हे त्याचे उत्तर आहे. एकदा अभ्यास दृढ झाला की मग ज्ञान आवर्जून सांभाळावे लागत नाही. पण त्यासाठी स्वप्नातही 'मी ब्रह्म आहे' ही भावना स्थिर राहिली पाहिजे.४०.

**भगवत्वाक्यतोऽसक्तः कुरु वा तैर्न लिप्यसे । मनो विनापि ज्ञातासि ध्यानादेः किं प्रयोजनम् ।।४३।।**

वा भगवत्+वाक्यतः असक्तः (सन्) कुरु तैर्न लिपसे। (त्वं) मनोविना अपि ज्ञाता असि (अतः) ध्यान+आदेः किं प्रयोजनम्।४३।

**ज्ञानी पुरुषाने कर्म करावे का?** जसा माळेत सापाचा अभाव तीनही काळात आहे, तसाच ब्रह्मात भ्रमाच्या पूर्वी आणि ज्ञानाच्या नंतरही आहेच. पण अभावालाच मोक्ष मानून शून्यतेचा अंगीकार करू नकोस. कारण त्या अभावाला जाणणारा सच्चिदानंदस्वरूप असा तू आहेसच.४१. तुला हा जो प्रकाशरूप बोध झाला आहे तो आजच झाला असे नाही. हा नित्यच आहे. कधीही नष्ट न होणारा आहे. 'हा जर नित्यच आहे तर वेद ह्या बोधाच्या प्राप्तीसाठी का उपदेश करतात?' या शिष्याच्या प्रश्नाला उत्तर आहे की, भ्रान्तीने देहालाच आपले स्वरूप मानणाऱ्या कल्याणकामी लोकांसाठी वेदांचा उपदेश आहे. तो मुक्तासांठी नाही. ज्यांना आत्मज्ञान हे साध्य आहे अशा साधकांनी वेदांनी उपदेशिलेली साधने करावीत. आत्मज्ञान झाल्यावर त्याची आवश्यकता राहत नाही. तेव्हा आता तू कांहीही साधन करूं नकोस. भ.गीतेत (३:१८) हेच सांगितले आहे. '*नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।*' त्याला कांही करण्याने वा न करण्याने कांहीच कमवायचे वा गमवायचे नसते.४२. किंवा तिथेच पुढे २५ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे लोकसंग्रह करण्यासाठी, लोकांना धडा घालून देण्यासाठी निरासक्त बुद्धीने कर्मे करावीत. आसक्ती आणि अहंकाराचा तुझ्या ठिकाणी अभाव असल्याने तू त्या कर्मांनी लिप्त होणार नाहीस. 'मग निदिध्यासनादि करावे कां?' या शिष्याच्या प्रश्नाला अपक्षून सांगितले आहे की त्याचीही आवश्यकता नाही. तुला देहाच्या ठिकाणी विपर्यस्त अहंभावना नसल्याने आणि तू मनाशिवायच स्वरूपाला जाणत असल्याने ध्यानादींचे काय प्रयोजन? पंचदशीत (तृप्तिदीप २६१) विपर्यस्ताला ध्यानाची आवश्यकता आहे अविपर्यस्ताला नाही असे प्रतिपादन आहे.४३. '*तस्य तावदेव चिरं*' (छांदोग्य उपनिषद ६:१४:२) या श्रुतीनुसार जोवर प्रारब्ध आहे तोवर हा पंचकोशात्मक देह राहील. मात्र, वर्ण, आश्रम, संबंध इत्यादि देहाचे धर्म, भूक, तहान इत्यादि प्राणाचे धर्म तसेच शोकमोहादि मनाचे धर्म, यांचा आता तुझ्याशी कांहीच संबंध नाही.

**अदेहप्राणहृद्धर्मः प्रारब्धाशीः सुखं वस । इदं रहस्यं बोधाख्यं तज्ज्ञो ब्रह्ममयो भवेत् ।।४४।।**

**इति बोधाख्यं द्वितीयं रहस्यम् ।।**

**समाप्तोऽयं ग्रन्थः प्रीयतामनेन श्रीदत्तः ।।**

**इति श्रीमत्परमहंस परिव्रजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती (टेम्बे) स्वामिविरचितं**

**श्रीगुरुचरितं सम्पूर्णम् ।।**

अ+देह+प्राण+हृत्+धर्मः (सन्) प्रारब्ध+आशीः सुखं वस। इदं बोधाख्यं (अति) रहस्यं तत्+ज्ञः ब्रह्म+मयः भवेत्।४४।

आता तू केवळ साक्षित्वाने प्रारब्धाचा वाहक बनून राहा. (पुढील अर्धश्लोक ग्रन्थालंकार आहे) हे 'बोध' नावाचे रहस्य आहे. रहस्य म्हणजे वेदांचा गोपनीय भाग जो अधिकारी श्रोत्यांच्याच (वाचकांच्या, ग्राहकांच्या) पदरी पडतो. हे रहस्य जाणणारा ब्रह्मरूप होतो. कठोपनिषदाच्या (२:३:८) प्रतिपादनानुसार 'जे जाणल्याने जीव बंधनांतून मुक्त होऊन अमृतत्व पावतात' तेच हे रहस्य होय.४४.

**इति द्वितीयं रहस्यं । संपूर्णोऽयं टीकाग्रंथः । प्रीयतामनेन सर्वान्तर्यामी भगवान्श्रीदत्तसद्‌गुरुः ॥**

**ज्ञानं त्रयोदाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः । पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट् ॥१॥**

**पाचात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताऽखिलानाम् ।**

**श्रीद्वारकायां चरितस्य तस्य श्रीसद्‌गुरोर्वेदनुतस्य तस्य ॥२॥**

**शालिवाहनाके क्ष्माश्विवसुभूमिमिते (१८२१) त्वियं ।**

**टीका संपूर्णतां प्राप्ता चातुर्मास्ये ह्यवर्षके ॥३॥ ॥ संवत् १९५६ ॥**

हा टीकाग्रंथ इथे संपूर्ण झाला. याने सर्वान्तर्यामी भगवान श्रीदत्तसद्गुरू प्रसन्न होवोत. तेरा अध्यायात ज्ञानयोग, नंतरच्या पाच अध्यायात कर्मयोग आणि शेवटच्या पाच अध्यायात भक्तियोग यांचे निरूपण योगिराज दत्तात्रेयांनीच करविले. त्या वेदवंद्य सद्गुरूंच्या चरित्रावरील नऊ अध्यायांवरची टीका पश्चिम समुद्राच्या तीरावर प्रभास क्षेत्री (ग्रंथ जवळ नसतांनाही) संपन्न झाली. शेष सर्व ग्रंथ श्रीक्षेत्र द्वारकेच्या चातुर्मासात शालिवाहन शकाच्या १८२१व्या वर्षी अवर्षणात पूर्ण झाला. संवत् १९५६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील बोधरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**पहिली आवृत्ती ---------**

**प्रकाशक :**

१. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा.

२. प.प.श्री.वासुदेवानंद सरस्वती स्वामिमहाराज व श्री. लोकनाथतीर्थ स्वामिमहाराज
ट्रस्ट, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

३. श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, नारेश्वर, पोस्ट सायर, व्हाया अंकलेश्वर, जि.वडोदरा ३९३१०७.



**मुद्रक**
के. जोशी आणि कंपनी
सदाशिव पेठ, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी - ०२०-२४४७१४०९
kjoshipress@gmail.com

संपादक.

डॉ.वासुदेव व्यंकटेश देशमुख,ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध, पुणे ४११००७.

**प्राप्तिस्थान**

श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, कर्वे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४

**मूल्य - रु. २००/-**

**।। श्रीगुरुः शरणम् ।।**





मला द्विसाहस्री ग्रंथाची उपासना देणाऱ्या

सद्गुरु प.पू.योगिराज वा.द.गुळवणीमहाराज

आणि त्या ग्रंथांत प्रवेश करविणाऱ्या प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर

यांच्या चरणकमलीं समर्पित

**(पू.डॉ.धीरूभाई जोशी, अध्यक्ष, श्रीवासुदेवप्रबोधिनी व प्रमुख विश्वस्त श्रीअवधूतनिवास ट्रस्ट, वडोदरा यांचा आशीर्वाद.)**

## अस्मदीयम्।

'द्विसाहस्री गुरुचरितम्' लोके ऱ्हस्वत्वात् शीघ्रफलदत्वाच्च प्रियं तथा विद्वत्सु साहित्यिकगुणत्वादुत्कृष्टटीकोपेतत्वादतीव संमान्यम्। अतः तद्ग्रन्थस्य लौकिकभाषायामनेकभाषान्तराणि जातानि।

अयं ग्रन्थोऽपि तद्वन्महाराष्ट्रभाषायां परिवृत्तोऽस्ति। तस्यानुवादकोऽपि डॉ. वा. व्यं. देशमुखो भक्तहृदयः, संस्कृत-प्राकृतभाषानिष्णातोऽस्ति लोके लब्धप्रतिष्ठितः। विशेषतः ब्रह्मलीनो ब्रह्मश्रीकवीश्वरशास्त्रिपदानुरागी तथा च तत्कृपालब्धो वर्तते। अतोऽस्य ग्रन्थस्य महिमा।

प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीमहाराजैरनेकग्रन्थान् रचितान्। 'प्रबोधिनी' तेषां भक्तजनमध्ये प्रसारकार्यं करोति। अद्य स्वामिसमाधीशताब्दिवर्षेऽयं ग्रन्थः प्रकाश्यते। तत्समीचीनं प्रशस्यं च। तदुपरि स्वामिमहाराजचरणानां शुभाशीर्वादाः सन्तु। भक्तजनेषु तत्प्रियतमो भवत्विति मे शुभाशा।

तत्प्रकाशने यैः प्रयत्नशीलैः यद्यत्सकार्यं कृतमस्ति तत्तत्तु सर्वथाऽभिनन्दनीयमस्ति। अस्य द्वितीयावृत्तिः शीघ्रं प्रकाशं पश्यतु।

भवदीयो

**हरिप्रसादः (धीरूभाई) जोशी.**

# प्रस्तावना.

**।। श्रीगुरुः शरणं मम।।**

सद्गुरु भगवान श्रीदत्तात्रेय का आविर्भाव बोध-अवतार रूप होने के प्रतिपादन से ही 'श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)' ग्रंथ का आरंभ होता है। उसी क्रम में श्री श्रीपादश्रीवल्लभ एवं श्री नरसिंह सरस्वती सद्गुरु की बोध-अवतार रूप में लीलाएँ हुई हैं। उसी क्रम में प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजश्री के बोध-अवतारकृत्य स्वरूप लीलाओं का विशद निरूपण पूजनीय श्री रङ्ग अवधूत महाराजश्री विरचित त्रिकाण्डात्मक वरद ग्रन्थ 'श्रीगुरुलीलामृत' के उपासनाकाण्ड एवं उन के अनुपम स्तोत्र 'श्रीवासुदेवनामसुधास्तोत्र' में दृष्टव्य है।

१) **तत्त्वज्ञानमुपादिश्य**... अर्थात् उन्हों ने माता (पूजनीया रमामाई) व पत्नी (पूजनीया अन्नपूर्णा माता) को तत्त्वज्ञान का उपदेश दिया... (श्लोक १९).

२) **भाष्यादि श्रावयामास**....जालवण (गांव) में भाविक भक्तों को भाष्य का श्रवण कराया.(श्लोक २६).

३) **योऽधिकारभिदा ग्रन्थान् रचयित्वा सुबोधकान्। उद्दधार भवे मग्नान् वासुदेव नमोऽस्तु ते।।५०।।** अर्थात् जिन्हों ने भवसागर में मग्न=रममाण लोगों का उद्धार करने के लिए उन के अधिकार भेद के अनुसार (अनेक) सुबोध व सरल=सुबोधात्मक ग्रंथों की रचना की।

पूजनीय स्वामी महाराज विरचित सद्बोधात्मक ग्रन्थों की सूची में श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री) ग्रन्थ अपने रचनास्वरूप वैशिष्ट्य एवं निरूपण रीति वैशिष्ट्य के उपरान्त औपासनिक उपादेयता वैशिष्ट्य से अनुपम वरद ग्रन्थ है।

ग्रन्थ श्रीगुरुतत्त्व-विमर्शात्मक है। गुरुतत्त्व ही मानवी साधना का चरम लक्ष्य व परम प्राप्तव्य है। श्रीगुरुतत्त्व अखण्ड आनन्द एकरस ज्ञानस्वरूप अर्थात् तत्त्वतः निर्विशेष - निर्गुण परब्रह्म स्वरूप होते हुए भी श्रीपादश्रीवल्लभ एवं नरसिंह सरस्वती अपने संन्यासी चरित द्वारा प्रत्यक्ष रूप में अपने भक्त उपासकों को दिव्यमन्त्र व अभीष्टफलप्रदान रूप अनुग्रह करते हैं। अतः श्रीगुरुराज सविशेष-निर्विशेष = सगुण-निर्गुण दोनों रूपों में उपास्य परब्रह्म हैं। मन्त्र ही देवस्वरूप है, इस सिद्धान्त के अनुसार प्रस्तुत ग्रन्थ सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय स्वरूपभूत श्रीश्रीपादश्रीवल्लभ-श्रीनरसिंह सरस्वती सद्गुरु अभिन्न मन्त्रमय ग्रन्थ है। स्वभक्त अभीष्ट प्रदानात्मक है, यथा :- **मुमुक्षुभेषजं मुक्तजीवनं विषयीष्टदम्। श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वात् वच्मि तेऽल्पकम्।।(३:९).** स्वोपज्ञ टीका में भगवान ग्रन्थकार कहते हैं, 'श्रीसद्गुरु का चरित्र (यद्यपि हृदय व वाणी से अत्यन्त दूर - अगम्य है, तथापि मैं तुम्हें थोडा सा कहता हूँ) विषयी जनों को अभीष्ट (अर्थ-काम) प्रदान करने वाला, मुमुक्षु भक्तो को संसार-रोग निवारक औषध और मुक्तों को निरुपम आह्लाद-जीवनभूत, कृतघ्नत्वनिवृत्ति रूप जीवनसाफल्य प्रदान करनेवाला है।'

यद्यपि सकल अभीष्ट अर्थ प्रदान करने वाली अनेक मन्त्र उपासनाएँ विभिन्न तन्त्र ग्रन्थों में प्रसिद्ध हैं, तथापि वे प्रायः शापित होने से, उनका प्रभाव कीलकत्व से प्रतिबद्ध होने के कारण शापविमोचन, उत्कीलन, आवरणपूजा, बलिदान आदि में थोडा सा भी वैगुण्य आने से उपासना का फल प्राप्त नही होता है। प्रस्तुत उपासना ग्रन्थ (और पूरी श्रीदत्तात्रेय उपासना प्रणाली) में कहीं किसी शापजनित प्रतिबद्धता न होने से यह समग्र उपासना अनायास फलदायी होने का प्रतिपादन भगवान ग्रन्थकार ने किया है। अतः अनायास फलप्राप्ति प्रस्तुत ग्रन्थ-उपासना का एक वैशिष्ट्य है।

श्रीगुरुचरितम्(द्विसाहस्री) स्वयं मन्त्रमय उपासना ग्रन्थ है और उस पर लिखी गई स्वोपज्ञ संस्कृत टीका अपने आप में एक स्वतन्त्र ग्रन्थ है, वस्तुतः ये दो ग्रन्थ हैं। दोनों की संस्कृत भाषा अत्यन्त प्राञ्जल है। मराठी भाषा में यह

ग्रन्थराज अनुवाद के रूप में पहले सी ही प्राप्त है। गुजराती व हिन्दी में भी ग्रन्थ का अनुवाद उपलब्ध है। यहाँ प्रस्तुत ग्रन्थ में विद्वान्, अनन्य उपासक व अनुग्रहीत भक्त अनुवादकजी ने प्रत्येक श्लोक का अन्वय, श्लोकार्थ एवं स्वोपज्ञ टीका पर आधारित विशद विवरण दे कर उपासक भक्तों के लिए एक सहायक मार्गदर्शक ग्रन्थ प्रदान किया है।

अनुवादक डॉ.श्री वासुदेव व्यं. देशमुखजी मूलतः चिकित्साशास्त्र की पॅथॉलोजी विद्या शाखा के गणमान्य अभ्यासी व प्राध्यापक, अनुसन्धानकर्ता के रूप में सर्विस प्रदान करने के बाद ऐच्छिक निवृत्त जीवन अध्यात्म मार्ग में व्यतीत कर रहे हैं। अपने कार्यक्षेत्र में सफल सिद्धि प्राप्त करने के साथ आपने प.पू. योगिराज श्रीगुळवणी महाराजश्री से अनुग्रहित हो कर, प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वरजी के सान्निध्य में रह कर जो आध्यात्मिक सिद्धि प्राप्त की है, उसका स्पष्ट प्रतिबिम्ब उनके व्यक्तित्व, कर्तृत्व में दृष्टिगोचर होता है। कम्प्युटर सिद्धिद्वारा उन्हों ने भक्तसमुदाय के लिए जो कार्य किया है वह अपने आप में अप्रतिम है।

सम्प्रति पूजनीय स्वामी महाराजश्री के समाधि शताब्दि वर्ष में प्रस्तुत ग्रन्थ एक सम्मान्य अनुवादक की साधना के फलस्वरूप विशाल जनसमाज को प्राप्त हो रहा है। सम्माननीय डॉ.श्री देशमुखजी एवं सम्माननीय प्रकाशन व्यवस्था का अभिवादन करते हुए मैं आनन्द और धन्यता का अनुभव करता हूँ।

**।। प्रीयतां अनेन सद्गुरु भगवान श्री रङ्गावधूतः इति।।**

**वल्लभविद्यानगर** — **शास्त्री जयेन्द्र दवे**

**गुरुपौर्णिमा दिनांक २२/७/२०१३, सोमवार**

**श्रीगुरुः शरणम्।**

**श्रीगुरुचरितम्। (द्विसाहस्री संहिता)**

# ग्रंथप्रवेश.

**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नमम्बासुतः स्तुतः। गन्धर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि।।**

**नमस्ते शारदे देवि वीणावादनतत्परे। सरस्वती जगन्माता सा मे बुद्धिं प्रचोदयात्।।**

**वासुदेवयतिं वन्दे वामनं मम सद्गुरुम्। कवीश्वरं च दत्ताख्यं याचे मतिप्रकाशनम्।।**

**वाङ्मयं वासुदेवस्य गहनं सागरादपि। चिंतनाय प्रवृत्तोऽस्मि मंदोऽप्यंतरशुद्धये।।४।।**

## श्रीगुरुचरित्र.

चौदाव्या शतकांत परधर्मीयांच्या आक्रमणांनी दक्षिण भारत व्यापून टाकला. बहामनी राजवटीने याच काळांत आपला जम बसविला होता. आक्रमणाला राजकीय आणि धार्मिक अशी दोन्ही अंगे होती. सनातन वैदिक धर्माच्या मुळावरच घाव बसत होते. धर्माचे आचरण, धर्माची मूलतत्त्वे आणि परंपरा या सर्वांनाच ग्लानि आली होती. एकीकडे हिंदू राजांची सत्ता कोलमडत होती तर दुसरीकडे समाजाला धर्माचे मार्गदर्शन करणारा ब्राह्मणवर्गच आचारभ्रष्ट होऊं लागला होता. *'यदा यदा हि धर्मस्य..'* या गीतावचनानुसार ईश्वरी अवतार प्रकट झाले. प्रथम आंध्र प्रदेशांत पूर्वसागराच्या जवळ पीठापूर येथे आचाराने आणि ऐहिक समृद्धीने संपन्न अशा ब्राह्मण कुळांत श्रीपादश्रीवल्लभ यांचा अवतार झाला. हाच श्रीदत्तात्रेयप्रभूंचा कलियुगांतील पहिला अवतार मानला जातो. श्रीपादश्रीवल्लभांच्या नंतर कांही दशकांत (इ.स. १३७८) श्रीदत्तप्रभूंचा द्वितीय अवतार श्रीनृसिंहसरस्वती यांचा जन्म झाला. या दोन्ही अवतारांचे कार्य परस्परपूरक असे झाले आहे.

यांनी हिंदू समाजाच्या सर्व घटकांच्या धार्मिक श्रद्धा तर दृढ केल्याच, पण तत्कालीन मुसलमान समाजावरही त्यांचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः ब्राह्मण समाजाला त्यांच्या धार्मिक जबाबदाऱ्यांची जाणीव करून देऊन आणि त्यांच्यात *'धर्मो रक्षति रक्षितः'* हा आत्मविश्वास निर्माण करून मुसलमानी धर्माच्या आक्रमणाला आळा घातला. या दोन महान विभूतींचे कार्य ज्ञानेश्वर-नामदेव आदि समकालीन आणि एकनाथ-तुकाराम आदि आगामी साधुसंतांच्या कार्याला पूरक असेच झाले आहे. संत एकनाथमहाराजांचे सद्गुरु संत जनार्दनस्वामी हे श्रीनृसिंहसरस्वतींचे शिष्यच होते.

या दोन अवतारांचे, मुख्यतः श्रीनृसिंहसरस्वतींचे चरित्र हा श्रीगुरुचरित्राचा विषय आहे. श्रीगुरुचरित्राचे लेखक सरस्वती गंगाधर साखरे हे कर्नाटकांतील कडगंची (उत्तरकांची) ह्या गांवचे. त्यांचे वडील गंगाधर यांचे पणजोबा सायंदेव साखरे हे श्रीनृसिंहसरस्वतींच्या प्रमुख शिष्यांत गणले जातात. लेखकाने आपल्याला 'महाराष्ट्र भाषा' येत नाही असे म्हटले असले तरी या ग्रंथाच्या व्युत्पन्न भाषेवरून तो त्यांचा विनयच आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. ह्या ग्रंथांत एकही यावनी भाषेचा शब्द आलेला नाही हे एक वैशिष्ट्य आहे. मराठीचे आद्यकवि मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'चा प्रभाव या ग्रंथांत कांही ठिकाणी आढळतो. श्रीनृसिंहसरस्वतींचे आपण 'नामधारक' आहोंत असे सांगून हे चरित्र आपल्याला श्रीनृसिंहसरस्वतींचे संन्यासी शिष्य श्रीसिद्धसरस्वती यांनी सांगितले असे ते म्हणतात. हा ग्रंथ सिद्ध आणि नामधारक यांच्यांतील संवादरूपच आहे. श्रीनृसिंहसरस्वतींच्या जीवनांतील घटना मांडणे एवढेच या ग्रंथाचे प्रयोजन नाही तर त्यांनी पुनरुज्जीवित केलेल्या वैदिक धर्माची शिकवण, आचार आणि संस्कार यांचीही सविस्तर मांडणी त्यांत केली आहे. सरस्वती गंगाधरांचा वेद, स्मृती आणि पुराणे यांचा सखोल व्यासंग त्यांतून स्पष्टपणे दृग्गोचर होतो. हा ग्रंथ पुराणाच्या धाटणीने लिहिला आहे. आख्याने आणि उपाख्याने यांचे प्रसंगाने निवेदन आहे आणि त्यांतून मुख्यतः वर्णाश्रमधर्माची मूलतत्त्वे, उपासनापद्धति आणि आचार यांचे प्रतिपादन आहे. दत्तसंप्रदायाचे आणि त्यांतील श्रीगुरुभक्तीचे माहात्म्य विशेषत्वाने वर्णिले आहे. सरस्वती गंगाधरांची ओंवी बऱ्याच वेळां गद्यप्राय वाटते

आणि शब्दांचे लालित्य हे तिचे वैशिष्ट्य नाही. पण प्रसंगोचित साहित्यांतील नवरसांचा आविष्कार त्यांत आहे तसेच अर्थालंकारांचीही समर्पक योजना केलेली आहे.

अर्थात साहित्यगुणांुळे हा ग्रंथ लोकप्रिय झाला असे नाही. ह्या ग्रंथांची प्रासादिकता - ईश्वराचा प्रसाद प्राप्त करून देण्याची क्षमता, विलक्षण आहे. प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आपल्या द्विसाहस्री ग्रंथाच्या उपसंहारांत या ग्रंथाचे वर्णन असे करतात. **'तत्संवादमयं ग्रंथं धर्म्यं गंगाधरात्मजः। सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत् तारकं सुधीः। यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूतरक्षामुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः। सप्ताहं तत्पाठिते शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति।।(२३ः११६-११७)** सिद्धमुनी आणि सरस्वती यांच्या संवादात्मक हा ग्रंथ जिथे कुठे नुसता ठेवलेला असला तरी भूत-प्रेत-पिशाचादि दुष्ट शक्तींचा नाश करतो. याचें सप्ताह पठण किंवा श्रवणही केले असतां दत्तात्रेय भगवान अभीष्ट कामना पुरवतात. इ.स. १४३८ च्या आसपास सिद्ध झालेल्या ह्या ग्रंथाची पारायणे असंख्य भक्तांनी करून आपले इष्ट प्राप्त करून घेतले आहे. आणि आजही करीत आहेत. साहजिकच दत्तसंप्रदायांत या ग्रंथाला वेदतुल्य मान आहे. ह्या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी वेदमंत्र उद्धृत केले असल्याने मुंज झालेल्या ब्राह्मणालाच हा वाचतां येतो. पण इतरांना हा ऐकतां येतो. स्त्रियांना हा ग्रंथ पठण करतां येत नाही; पण त्यांना तो ऐकतां येतो. या ग्रंथाला प्रदक्षिणा घालूनही याच्या प्रसादाचा लाभ अनेक स्त्रियांनी घेतला आहे आणि घेत आहेत.

### प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती यांचा पहिला ग्रंथ.

कदाचित् याच कारणामुळे ह्या ग्रंथांतील लौकिक आशयाकडे दुर्लक्ष झाले असावे. केवळ साहित्यकृती म्हणून किंवा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून याचे समीक्षण अलीकडेच झाले आहे. अर्वाचीन (१८५४ - १९१४) दत्तावतार मानले जाणारे महान संत प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांनी या ग्रंथावर संस्कृत आणि प्राकृत रचना करून त्यांतील धार्मिक प्रतिपादनांचे, तात्त्विक प्रमेयांचे आणि श्रीगुरूंच्या लीलांचे विवरण केले आहे. त्यांतून या ग्रंथाचे

वैदिक संप्रदायाशी असलेले दृढ नाते स्पष्ट करून त्याचे श्रुति-स्मृति-पुराणांच्या परंपरेतील स्थान विशद केले आहे. तसेच भागवत संप्रदाय आणि श्रीमच्छंकराचार्यांचा अद्वैत संप्रदाय यांच्याशी असलेल्या दत्तसंप्रदायाच्या अतूट संबंधाचेही दिग्दर्शन केले आहे.

या ग्रंथांपैकी सर्वांत प्रथम झालेला ग्रंथ म्हणजेच 'श्रीगुरुचरितम्'. माणगांवला असतांना (इ.स. १८८४) श्रीदत्तप्रभूंची श्रीवासुदेवशास्त्रींना (प.प. टेंबे स्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमींचे नांव) संस्कृतमध्ये गुरुचरित्र लिहिण्याची दत्तप्रभूंची आज्ञा झाली. त्या वेळी शास्त्रीबुवांचे संस्कृत अध्ययन माणगांवांतच अगदी जुजबी झाले होते. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे संस्कृत भाषांतर आपल्याला कसें जमणार?' असा विचार बुवांच्या मनांत आलाही; पण 'लिहायला आरंभ करा,' अशी दत्तप्रभूंची आज्ञा झाली. आश्चर्य म्हणजे ग्रंथ अवघ्या बारा दिवसांत लिहूनही झाला. ह्या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना शास्त्रीबुवांचे एक भक्त सावंतवाडीचे नारोपंत यांनी ते लेखन पाहिले. ते बुवांपेक्षा वयाने वडील असून त्यांनी बुवांना लहानपणापासून पाहिले होते. त्यांनी बुवांना विचारले की, 'बुवा! तुमचे संस्कृतचे फारसे अध्ययन नसतांनाही ही संस्कृत काव्यरचना कशी करूं शकतां?' त्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, 'मी कुठे हा ग्रंथ लिहितो? मला जशी अक्षरे दिसतात तशींच मी कागदावर उतरून काढतो.' यावरून सहजच असे अनुमान निघते की हा ग्रंथ अपौरुषेय असून श्रीस्वामीमहाराज हे त्याचे द्रष्टे आहेत.

वर सांगितल्याप्रमाणे अवघ्या बारा दिवसांत ग्रंथ पूर्ण झाल्यावर शास्त्रीबुवांच्या कानांवर 'संहितेयं द्विसाहस्री' असे श्रीदत्तगुरूंचे शब्द कानांवर पडले. तेव्हां कुतूहलाने ग्रंथाचे श्लोक मोजून पाहतां ती संख्या दोन हजारांपेक्षां बरीच कमी भरली. 'श्रीदत्तप्रभूंचे सांगणे कसे चुकेल?' असा विचार करून बुवांनी दुर्गासप्तशतीच्या गणनेप्रमाणे अर्धश्लोक, उवाच हेही त्यांत मोजल्यावर संख्या बरोबर दोन हजार भरली. तेव्हांपासूनच या ग्रंथाला 'द्विसाहस्री' या नांवानेच सर्व ओळखूं लागले. हा ग्रंथ मंत्रात्मक असल्याची ती साक्षच होती. नंतर तो ग्रंथ वाचून पाहतांना बुवांना त्यांत व्याकरणाचे वगैरे

कांही दोष वाटले म्हणून ते दुरुस्त करण्यासाठी लेखणी उचलली तेव्हां, 'हे झाले आहे तसेच मला आवडले आहे. त्यांत बदल करू नये. शिवाय अन्य व्याकरणानुसार (पाणिनीव्यतिरिक्त) ते शुद्धच आहे.' अशी स्पष्ट आज्ञा झाली. तेव्हां महाराजांनी तो ग्रंथ तसाच ठेवला. या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणी प्राचीन चांद्र व्याकरणाचे प्रयोग आढळतात. दत्तप्रभूंनी ते मान्य केल्याने साहजिकच हे आर्ष प्रयोग ठरतात.

अर्थात श्रीगुरुचरित्राच्या तुलनेत हे संक्षिप्त भाषांतर काव्यगुणांत खूप सरस आहे. विविध वृत्तांतून रसपोष करण्याची श्रीस्वामिमहाराजांची हातोटी विलक्षण आहे. यमक, प्रास (उदा. शिष्टं कुष्टं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः।) आदि शब्दालंकार विपुल आहेत. भक्ति किंवा शांत रस हा जरी प्रधान रस असला तरी प्रसंगानुसार करुण, हास्य आदि रसांचीही योजना केली आहे. बावीसाव्या अध्यायांत शेत कापणाऱ्या पतीला अडविणाऱ्या स्त्रीला तो मारायला धावतो तेव्हां ती पळतांना तिच्या पायांखालची माती केसांचे चूर्ण झाली (निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत्।।) असे विनोदी चित्र ते उभे करतात. सोळाव्या अध्यायांतील सावित्रीच्या विलापांतील करुणरस हृदयस्पर्शी आहे. बऱ्याच ठिकाणी अर्थांतरन्यासांतून सुभाषिते पेरण्याचे कौशल्य दिसून येते. उदा. 'लोकाः स्वकर्मसूत्रोथा वृथाहंकारसंश्रिताः।।', 'मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भिषजे गुरौ यादृशी भावना यस्य सिद्धिस्तु तादृशी।।', 'लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः' इत्यादि.

**द्विसाहस्रीची रचना.**

मूळ गुरुचरित्रांत ५२ अध्याय (अवतरणिका धरून) व ७३०० हून अधिक श्लोक आहेत. द्विसाहस्रीत तेवीस अध्याय आहेत. अर्थात संस्कृत भाषेच्या वैशिष्टयामुळें कमीत कमी शब्दांत अधिकांत अधिक आशय मांडण्यांत श्रीस्वामी महाराज यशस्वी झाले आहेत. त्यांनी एकाक्षरी कोशाचाही सढळ हाताने उपयोग केलेला दिसतो. यांतही चौथ्या अध्यायांत मूळ गुरुचरित्रांत नसलेला यदु, प्रह्लाद आणि कार्तवीर्य यांना केलेला उपदेश आहे. श्रीस्वामीहाराज

स्वतःच या अध्यायाला 'क्षेपक' अध्याय म्हणतात. या तेवीस अध्यायांखेरीज द्विसाहस्रींत आरंभीं १११ श्लोकांची श्रीगुरुस्तुति आहे. मूळ गुरुचरित्रात दत्तात्रेय देवतेचे स्वरूप, त्यांच्या उपासनापद्धति आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये ह्यांचा फारसा विचार केलेला नाही. ह्या प्रकरणांत श्रीमहाराजांनी दत्तात्रेय, त्यांचे स्वरूप, त्यांची उपासना, त्यांची सर्वसुलभता इत्यादींचे विवरण केले आहे. ग्रंथाच्या शेवटी दत्तसंप्रदायाचे वैशिष्ट्य मानल्या गेलेल्या अष्टांगयोगाच्या दिग्दर्शनासाठी योगरहस्य, तसेच शांकर अद्वैताच्या मांडणीसाठी बोधरहस्य ही दोन प्रकरणे जोडली आहेत. ही द्विसाहस्रीची रचना दुर्गासप्तशतीच्या रचनेसारखीच आहे. वर निर्देश केल्याप्रमाणे गणना करितां सातशें श्लोक आणि तीन रहस्ये दुर्गासप्तशतीत दिसून येतात.

## त्रिकांडात्मक रचना

वैदिक परंपरेला अनुसरून भगवद्गीतेप्रमाणे गुरुचरित्राचीही रचना ज्ञान, कर्म आणि उपासना अशी त्रिकांडात्मक आहे हे श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्रीची रचना तशी केल्यावरच इतर अभ्यासकांच्या ध्यानांत आले. श्रीमहाराज टीकेच्या समारोपांत स्वतःच म्हणतात, **'ज्ञानं त्रयोदशाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः। पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट्॥'** पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोग, नंतरच्या पांच अध्यायांत कर्मयोग आणि शेवटच्या पांच अध्यायांत भक्तियोग अशी रचना योगिराज दत्तप्रभूंनी करविली. यानुसार श्रीगुरुचरित्राची रचना पाहतां अध्याय २४ पर्यंत ज्ञानकांड, ३७ पर्यंत कर्मकांड आणि ५१ पर्यंत भक्तिकांड अशी होते. श्रीगुरुसंहिता (समश्लोकी) या आपल्या ग्रंथांत श्रीस्वामीमहाराजांनी अशीच योजना केली आहे.

## द्विसाहस्रीची टीका.

मूळ द्विसाहस्री वर सांगितल्याप्रमाणे गृहस्थाश्रमांत इ.स. १८८४ त लिहून झाली. १८९१ साली पत्नीच्या मृत्यूनंतर वयाच्या ३५ व्या वर्षी गंगाखेड येथे वासुदेवशास्त्रींनी संन्यास घेतला. १८९८ साली चिखलदा येथे आठवा चातुर्मास

करून श्रीस्वामीमहाराज प्रभासपट्टण येथे आले असतां त्यांना दत्तप्रभूंची द्विसाहस्रीवर टीका लिहिण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे पंधरा वर्षांनंतर आपल्या ग्रंथावर स्वामीमहाराजांनी स्वतःच टीका (याला स्वोपज्ञ टीका म्हणतात) लिहिण्यास आरंभ केला. मूळ ग्रंथ या वेळी समोर नव्हता. तरी केवळ स्मरण करूनच या टीकेचे लेखन झाले हे विशेष होय. ही टीका द्वारकेत श्रीमहाराजांच्या आठव्या चातुर्मासांत पूर्ण झाली. यासंबंधी प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात, 'समष्ट्यात्मक भगवत्स्वरूपाशी संलग्न झालेल्या सत्पुरुषांच्या विशालबुद्धीला अगम्य असें कांहीच नाही.' श्रीस्वामीमहाराजांनीच लिहिले आहे कीं नऊ अध्यायांची टीका प्रभास क्षेत्रांत झाली व शेष सर्व अध्यायांची द्वारकेंत झाली. **(पाश्चात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताखिलानां। श्रीद्वारकायां चरितस्य तस्य सद्गुरोर्वेदनुतस्य तस्य।।)** टीकेनंतर या ग्रंथांची चूर्णिका म्हणजे सरल गद्य अनुवादही द्वारकेतच झाला.

**पदच्छेदः पदार्थोक्ति विग्रहो वाक्ययोजना, आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् ।।** या उक्तीप्रमाणे वाक्याची पदें पाडणे, त्यांचा अर्थ सांगणे, संधी सोडवणे, वाक्याचा अर्थ लावणे आणि आक्षेपांचे समाधान करणे ही व्याख्यानाची (टीकेची) पांच लक्षणे आहेत. पण श्रीस्वामीमहाराजांची टीका यांच्याही पुढे जाऊन स्वतंत्र मताचे प्रतिपादनही करते. त्यामुळे ती भाष्य या संज्ञेला पात्र ठरते. **(सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुसारिभिः। स्वपदानि च वर्ण्यते भाष्यं भाष्यविदो विदुः)** ह्या टीकेच्या माध्यमांतून श्रीस्वामी महाराजांनी श्रीगुरुचरित्राचे सिद्धांत स्पष्ट करून त्यांची श्रुति-स्मृति-पुराणांशीं संगति दर्शविली आहे. तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा (वेदांत) या षड्दर्शनांच्या, आणि गुरुचरित्रांतील प्रमेयांची एकवाक्यता विशद केली आहे. गीता-भागवत या ग्रंथांतीलच तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन गुरुचरित्रांत कसे अनुस्यूत आहे तेही स्पष्ट केले आहे. पर्यायाने श्रीदत्तसंप्रदाय हा कसा भागवतसंप्रदायांतच अंतर्भूत आहे तेही दर्शविले आहे. गुरुचरित्रांतील वेदांत हा श्रीमच्छंकराचार्यांच्या अद्वैतमताला कसा अनुसरून आहे हेही श्रीस्वामीमहाराजांनी विशद केले आहे. अर्थातच ही टीका लिहितांना वेदशास्त्रादि १७०हून

अधिक ग्रंथाचे संदर्भ उद्धरणासहित दिलेले आहेत. हे केवळ स्मरणशक्तीच्या आधारेच दिलेले आहेत. 'मूळ गुरुचरित्रांत नसलेले कांही विषय द्विसाहस्रींत आल्याचे वर आपण पाहिलेच आहे. असेच अनेक विषय टीकेंतही श्रीस्वामीमहाराजांनी हाताळलेले आहेत. श्रीगुरुचरण 'प.पू.गुळवणीमहाराजां'नी यांतील कांही उदाहरणे दिली आहेत. 'माया कां मानावी? ईश्वर पक्षपाती आहे काय? जगाचे अस्तित्व व नास्तित्व हे अध्यारोपापवादात्मक कसे आहे? कर्माचा ज्ञानाला कसा उपयोग होतो? कर्माचरण कसे केले असतां चित्त शुद्ध होते? ईश्वरावतारांचे स्वरूप काय व ते कसे होतात? ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांतच गेले पाहिजे किंवा एकदम संन्यासाश्रमांत जातां येईल? संन्यासाश्रम घेतल्यावर शिष्यप्रशिष्यपरंपरा कां चालूं ठेवावी? जीवन्मुक्ताची आंतरस्थिति कशी असते? तीर्थयात्रा कां करावी? सद्गुरुसेवा सर्वांनीच कां करावी? शरीरांतून जीव जातो कां प्राणवायु जातो, शरीरस्थिति मुख्यतः कोणावर अवलंबून आहे? अविद्येपासून उत्पन्न झालेले कर्म तीच अविद्या घालविण्यास कसे कारणीभूत होते? ब्रह्मज्ञानी पुरुषाने कर्म टाकावे काय? एकाच जन्मांत सर्व कर्मफलांचा भोग संपवून मुक्त होणे शक्य आहे काय? पतिपत्नीसंबंध, गुरुशिष्यसंबंध, स्वामिसेवकसंबंध इत्यादि कसे निर्माण होतात व ते कसे दूर होतात? बंधक असलेली काम्यकर्मे वेदांत कां सांगितली? मनुष्य, पितर, देव यांची कालगणना कशी करावी? चंद्रकलांचे स्वरूप काय? गायत्री मंत्राचा अर्थ काय? त्या मंत्राचे इतके महत्त्व कां? आपत्कालांत कसे वागावे? मुख्य ज्ञानयोग व त्याचे साधन कर्मयोग यापेक्षां तिसरा भक्तियोग कशाला पाहिजे? भगवंताकडूनच वेदाज्ञेचे उल्लंघन झाल्यास तें योग्य कां अयोग्य? साकाराच्या भक्तीने मोक्ष कसा मिळेल? शूद्र हा श्रौतविद्येचा अधिकारी आहे कीं नाही? त्याला मुक्ति कशी मिळेल? रोगादि दुःखांचे खरें कारण कोणतें व त्यांचा परिहार कसा होऊं शकेल?'

अशा रीतीने द्विसाहस्री ह्या ग्रंथांत दत्तसंप्रदायाच्या तात्त्विक बैठकीची सप्रमाण संस्थापना झाली आहे. त्याचप्रमाणे दत्तोपासनेच्या विविध परिमाणांचे सूत्रात्मक दिग्दर्शनही आहे. ह्या ग्रंथांत प्रतिपादलेल्या मूलतत्त्वांचाच विस्तार

श्रीमहाराजांनी आपल्या विशाल वाङ्मयांत पुढे केलेला कुणाही विचक्षण वाचकाला दिसून येईल.

**फलश्रुति.**

श्रीगुरुचरित्राची प्रासादिकता आपण वर पाहिलीच आहे. श्रीस्वामीमहाराजांच्यासारख्या अवतारी महात्म्याने श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच केलेल्या ह्या त्याच्या संस्कृत रूपांतरांतही ती प्रासादिकता उतरली असल्यास नवल नाही. ग्रंथाच्या समारोपांत महाराजश्री म्हणतात, ‘ **स एवात्रेयगोत्रोत्थगणेशब्रह्मपुत्रगाः। पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रंथात्मा तारकोऽव्ययः।।** ’ तोच (सरस्वती गंगाधरलिखित) श्रीगुरुचरित्रग्रंथरूपी तारक आणि अव्यय दत्तात्रेय अत्रिगोत्रोत्पन्न गणेशब्राह्मणाच्या पुत्राची वाणी पावन करीत इथे विराजत आहे. श्रीगुरुचरित्राच्या पठणाने वा श्रवणाने होणाऱ्या ऐहिक आणि आमुष्मिक कल्याणाचीच ही ग्वाही आहे. त्यानुसार अनेक दत्तभक्त या ग्रंथाची उपासना करून आपले जीवन कृतार्थ करीत आहेत. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतींच्या प्रश्नावलीत या ग्रंथाची फलश्रुति अशी सांगितली आहे.

**देईल तो इष्टसिद्धी वासुदेव यतीश्वर। ‘द्विसाहस्री’ गुरुकथा सप्ताहें दूर हो दर।।**

श्रीगुरुचरित्राप्रमाणेच या ग्रंथाचेही सप्ताह करून इष्टसिद्धि पावणारे हजारों दत्तभक्त आजही आहेत. ‘केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे।’ या समर्थोक्तीनुसार हा श्रद्धेचा आणि अनुभवाचा विषय आहे.

**द्विसाहस्रीची हवनीयता.**

ह्या ग्रंथाला ‘द्विसाहस्री संहिता’ असे नांव देतांना दत्तप्रभूंनीच हा सामान्य ग्रंथ नसून मंत्रमय संहिता आहे असा संकेत दिलेला दिसतो. अर्थात् त्याकडे श्रीमहाराजांनी (बहुतेक हेतुपुरःसर) दुर्लक्ष केले. यांत त्यांचे अमानित्वच दिसून होते. हे सगळे मान्य करणे म्हणजे स्वतःकडे ऋषित्व घेणे ठरले असते. श्रीमहाराजांच्याकडून ह्या ग्रंथाच्या हवनाचा पुरस्कार होत नाही हे पाहूनच बहुधा दत्तप्रभूंनी महाराजांचे सावंतवाडीचे ऋणानुबंधी व शिष्य आणि महान्

दत्तभक्त श्री. नारोपंत उकिडवे यांना स्वप्नदृष्टांतांत संस्कृत गुरुचरित्राचा स्वाहाकार करण्याची आज्ञा केली. नारोपंतांनी आपली आर्थिक अडचण दत्तप्रभूंना निवेदन केली. तेव्हां त्यांनी पैशांची व्यवस्था कुणाकडून होईल ते सांगितले व त्या गृहस्थांनी स्वाहाकाराचा सर्व खर्च करण्याची तयारीही दाखविली. एवढ्यांत सावंतवाडीत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. पुन्हां नारोपंतांना स्वप्न झाले की 'प्लेग थांबेल, तुम्ही स्वाहाकाराची तयारी करा.' नारोपंतानी ही स्वप्नांत झालेली आज्ञा त्यावेळी पवनीस चातुर्मासानिमित्त असलेल्या श्रीस्वामीमहाराजांना कळविली. त्यावेळचे श्रीस्वामिमहाराजांचे पत्र असे आहे.(अ.श्रावण शु।।७, शके १८३१).

'रा.रा.नारायण उकिडवे सावंतवाडी यांस नारायण. हल्ली विजयवाड्यातून आपले पूर्वी पाठविलेले पत्र पोचले. जे स्वप्न झाले ते सद्गुरूंनी दाखविले. मंत्रशास्त्रांत मनुष्यांनी केले अनार्ष ग्रंथ यांचे अनुष्ठान करूं नये असे आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्याचा कोणी सांगावा व हा ग्रंथ मी केला असाही अभिमान. श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो, पण स्वाहाकार करा असे अनुमोदन द्यावे अशी प्रवृत्ती होत नाही. गुरुचरित्र स्वाहाकाराविषयी स्वतः निराधार. कांहीच सांगतां येत नाही. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कांही अप्रामाणिक बोलतां येत नाही. कळावे. नारायण.'

ह्या पत्राचा विचार करतां कांही गोष्टी स्पष्ट होतात. मुख्य म्हणजे नारोपंतांना झालेला दृष्टांत दत्तप्रभूंनीच दिलेला आहे ह्याला श्रीस्वामीमहाराजांनी दुजोरा दिला आहे. मानवनिर्मित अनार्ष ग्रंथांचा स्वाहाकार करण्याबद्दल साशंकता प्रकट केली आहे. तसेच गुरुचरित्राचा स्वाहाकार नव्यानेच करण्याचा प्रस्ताव असल्याने त्याला आधीचे कांही प्रमाण वा आधार नाहीत. त्यामुळे ह्याविषयी कांही सांगण्यास आपण असमर्थ आहो असा अभिप्राय दिसतो. हा ग्रंथ आपणच केला असल्याने अभिमानाची भीतीही श्रीस्वामीमहाराजांना वाटली आहे. इतके असूनही ह्या पत्रांत हे हवन करूं नका असे निक्षून न म्हणता 'श्रीगुरूंची इच्छा असेल तसे घडो.' असे म्हटले आहे. ह्या हवनाला संमति देण्याची मात्र श्रीमहाराजांच्या मनाची तयारी नव्हती. श्रीगुरुचरित्राच्या हवनाचा आत्यंतिक निषेध ह्या पत्रांत आढळत

नाही. अनार्ष ग्रंथाच्या अनुष्ठानाच्या निषेधाबद्दलही त्यांनी मंत्रशास्त्राचा हवाला दिला आहे. इथे हे विचारणीय आहे की श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वीपासूनच दुर्गासप्तशती, भागवतपुराण इत्यादी ग्रंथांचे हवन प्रचलित होते. त्याचा श्रीस्वामीमहाराजांनी निषेध केल्याचे ऐकीवांत नाही.

विशेष गोष्ट अशी आहे की आपल्या सद्गुरूंचे हे पत्र आल्यावर नारोपंतांनी हवनाचा विचार सोडून दिला. तरीही भगवान दत्तात्रेयांनी त्यांना पुन्हां स्वप्नद्वारा आज्ञा केली कीं, 'ज्योतीपंतांनी भागवताचा स्वाहाकार केला तसा तू संस्कृत गुरुचरित्राचा कर.' ह्या दृष्टांतांत खरे तर श्रीस्वामीमहाराजांच्या आक्षेपाचे स्पष्ट उत्तर होते. तसेच देवता, निर्वाप, हवनप्रकार यांचीही सूचना होती.  नारोपंतांच्या अनन्य गुरुभक्तीचे खरेच कौतुक करायला हवे की वारंवार दत्ताज्ञा होऊनही त्यांनी पुन्हां श्रीस्वामीमहाराजांना पत्रद्वारे विचारणा केली. अपेक्षेप्रमाणे पुन्हा सद्गुरूंचे नकारात्मक पत्र आले. त्यांत 'तुम्हांला कांही कर्तव्य असल्यास १० पारायणे करून ब्राह्मणभोजन घाला.' अशी आज्ञा झाली. कांही अनुष्ठानच न करण्याच्या पूर्वीच्या भूमिकेत पडलेला हा फरक लक्षणीय आहे.

गेल्या ३०-४० वर्षांत द्विसाहस्रीसह श्रीस्वामीमहाराजांच्या अनेक ग्रंथांची हवने त्यांच्या संप्रदायांतील भक्तांनी आयोजित केली आहेत. ह्यापैकी नारेश्वरवासी संत पू. श्रीरंग अवधूत महाराजांच्या शिष्यांचा विशेष पुढाकार दिसतो. तेथील प्रमुख विश्वस्त व श्री. प.प. वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. हरिप्रसाद (धीरुभाई) जोशी यांच्या पत्रानुसार द्विसाहस्री गुरुचरित्राचा पहिला स्वाहाकार भरूच येथे त्यांचे पिताश्री व श्रीरंगअवधूतांचे अंतरंग शिष्य पू. श्री शिवप्रसाद जोशी यांच्या पुढाकाराने झाला. हा स्वाहाकार करावा किंवा नाही असा प्रश्न श्रीस्वामीमहाराजांना विचारून प्रार्थनापूर्वक चिठ्ठ्या टाकण्यांत आल्या. त्यांचा होकारार्थी कौल मिळाल्याने स्वाहाकार करण्यांत आला. पू. शिवप्रसाद हे प्रसिद्ध कर्मकांडी असल्याने त्यांनी केलेल्या विधानानुसार हा स्वाहाकार झाला. श्रीदत्तप्रभूंच्या अवतारांची संख्या लक्षांत घेऊन सोळा ऋत्विज हवनाला बसतात. 'द्रां दत्तात्रेयाय नमः' हा पल्लव

लावण्यात येतो. हविर्द्रव्य म्हणून त्रिमधुप्लुत पायसाचा प्रयोग केला जातो. यानंतर अनेक ठिकाणी या संहितेची हवने झाली आहेत. त्यांपैकीं कांहीत लेखकालाही सहभागी होण्याचे भाग्य लाभले आहे.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट आहे की हा ग्रंथ - नव्हे ही संहिता, श्रीदत्तप्रभूंच्या संकल्पानेच सिद्ध झालेली आहे. प.पू.योगिराज गुळवणीमहाराज म्हणतात त्याप्रमाणे हा श्रीदत्तराजांचा ग्रंथावतारच आहे आणि त्याचे 'श्रवण, मनन, निदिध्यासनरूपाने नित्य सेवन करणे' हे सर्व आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू साधकांच्या परमकल्याणाला कारणीभूत ठरणारे आहे. या ग्रंथाच्या मूळ संहितेची मराठी व हिंदी भाषांतरे उपलब्ध आहेत. पण टीकेचे भाषांतर उपलब्ध नव्हते. (अगदी अलीकडेच टीकेचेही एक मराठी भाषांतर पहाण्यांत आले आहे.) त्यासाठी या ग्रंथाचा तसेच टीकेचाही भावार्थ समजून घेण्याचा ह्या ग्रंथांत प्रयत्न केला आहे. प्रस्तुत लेखकाला त्याच्या सीमित क्षमतांची तीव्र जाणीव आहे. ह्या ग्रंथाचा यथार्थ बोध होण्यासाठी आवश्यक असलेली योग्यता लेखकांत अंशतःसुद्धां नाही. पण आपल्या शक्त्यनुसार जे व जेवढे समजेल ते सुबोध प्रकारे सांगण्याचा हा प्रयत्न आहे. निरूपण हा अध्ययनाचाच एक प्रकार आहे. ही त्या ग्रंथात्म्याची सेवाच आहे. सिद्ध ग्रंथांचे वाचन चित्तशुद्धिकारक असल्याने ते अनधिकार व्यक्तीचेही कल्याणच करते ह्या श्रद्धेने केलेले हे लेखन आहे. या प्रयत्नांतून आपल्या अंतःकरणांत त्यांतील आशय अंशतः उतरला तरी हा उद्यम सफल होईल अशी काकुळती आहे. प्रथम मूळ संहितेचे श्लोक देऊन त्यांचा अन्वय खाली दिला आहे. त्यानंतर श्लोक व श्रीस्वामिमहाराजांची टीका यांचा मराठी अनुवाद दिला आहे. कांही ठिकाणी श्रीमहाराजांनी केवळ संकेताने दर्शविलेले संदर्भ मोजक्या शब्दांत स्पष्ट करण्याचाही प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांच्या आशयाला धरूनच हा प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांनी दिलेले व्याकरणाचे संदर्भ मात्र वगळले आहेत. त्यामुळे भावार्थाच्या आकलनात काहीं त्रुटी जाणवणार नाही अशी आशा आहे. विद्वज्जनांना बऱ्याच ठिकाणी प्रस्तुत अनवादकाच्या ज्ञानाच्या मर्यादा दिसून येतील. त्यांनी उदार मनाने त्यांची उपेक्षा करून नीरक्षीरन्यायाने श्रीस्वामिमहाराजांचे प्रमेयरूपी सार ग्रहण

करावे अशी प्रार्थना आहे. वाक्सेवेद्वारे लेखक आणि वाचक उभयतांचेही कल्याण व्हावे हीच श्रीगुरुचरणीं प्रार्थना!

'द्विसाहस्री गुरुचरितम्' हा ग्रंथ प.पू. योगतपस्वी श्रीनारायणकाका ढेकणे महाराज यांच्या प्रेरणेने कार्यरत असलेल्या 'श्रीवासुदेवनिवास स्वाध्याय मंडळांत वाचला आणि चर्चिला गेला आहे. लेखकाला त्याचा बोध होण्यांत मंडळाच्या सदस्यांच्या योगदानाचे ऋण इथे नमूद करणे आवश्यक वाटते. ह्या स्वाध्याय मंडळाच्या माध्यमांतून हे निरूपण आपल्या गुरुपरंपरेला सादर केल्याचे समाधान आम्हांला लाभले आहे. २०१४ इ.स. च्या आषाढ शुक्ल प्रतिपदेला प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज यांची शंभरावी पुण्यतिथि येत आहे. सर्व भारतांत पुढील वर्ष 'समाधीशताब्दि' महोत्सव वर्ष म्हणून साजरे होत आहे. ह्या पर्वणीत हा ग्रंथ प्रकाशित होत आहे हा समष्टीचा एक शुभ संकेतच आहे. त्यांचे हे कार्य त्यांनीच सिद्धीला न्यावे अशी प्रार्थना करूं या.

या ग्रंथाचे लेखन चालूं असतांना ते लिखाण श्रीनरसोबावाडीचे वे.मू.डॉ.बाळकृष्ण महादेव जमदग्नि यांच्या निदर्शनास आले. डॉ. जमदग्नि हे प.पू. वक्रतुंडबुवा यांनी सुरूं केलेल्या परंपरेनुसार वाडी येथे श्रीस्वारी(उत्सवमूर्ति)पुढे पुराणसेवा करीत असतात. हे लिखाण त्यांना आवडून त्यांनी ते श्रींच्यापुढे पुराणरूपाने वाचून दाखविले. हा मी भक्तवत्सल भक्ताभिमानी श्रीदत्तप्रभूंचा या लेखनसेवेला लाभलेला आशीर्वादच मानतो. डॉ.जमदग्नि यांनी, तसेच वल्लभविद्यानगर (आणंद) येथील प. पू. श्रीरंग अवधूत महाराजांचे शिष्य विद्वान, व्यासंगी व गुरुभक्त शास्त्री डॉ.जयेंद्रभाई दवे यांनीही ह्या लिखाणाचे परिशीलन करून, महत्त्वपूर्ण सूचना केल्या आहेत व माझा उत्साह आपल्या आत्मीयतेने वाढविला आहे. डॉ.जमदग्नि यांनी परिश्रमपूर्वक मुद्रितांच्या शोधनाचेही कार्य केले आहे. हे दोन्ही विद्वान् दत्तभक्त द्विसाहस्री संहितेचे 'उपजीवी' आहेत. त्यांच्या योगदानाने ह्या ग्रंथाचे मोल वाढले आहे.

ह्या ग्रंथाचे प्रकाशन प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनी, वडोदरा, श्री अवधूत निवास

ट्रस्ट, नारेश्वर,  आणि श्रीवासुदेवनिवास, पुणे या संस्थांच्या आर्थिक साह्यानेच शक्य झाले आहे. श्रीवासुदेवनिवासाचे प्रमुख विश्वस्त प.पू. पं. शरदभाऊ जोशी यांनी वेळोवेळी दिलेल्या उत्तेजनाचा आणि प्रकाशनासाठी घेतलेल्या पुढाकाराचा इथे विशेष उल्लेख केला पाहिजे. श्रीवासुदेवनिवासच्या विश्वस्तमंडळानेही ह्या कार्याला उत्तम प्रतिसाद दिला आहे. नारेश्वरच्या अवधूतनिवास ट्रस्टचे व प्रबोधिनीचे अध्यक्ष पू. डॉ.हरिप्रसाद (धीरूभाई) शिवप्रसाद जोशी यांनी आत्मीयतेने केलेल्या मार्गदर्शनाचा आणि भरघोस साह्याचा प्रस्तुत लेखक सदैव ऋणी राहील. श्रीवासुदेव प्रबोधिनीचे सभासद आणि पदाधिकारी यांनी दहा वर्षे लेखकावर जो लोभ केला आहे त्याचाच हा ग्रंथ एक आविष्कार आहे. या सर्वांचा मी सदैव ऋणी राहीन. या संस्थांच्या आर्थिक सहकारानेच प.पू. योगिराज श्रीगुरुमहाराज यांनी घालून दिलेल्या पायंड्याप्रमाणे, जवळपास ७०० पृष्ठांच्या ह्या ग्रंथाचे मूल्य केवळ २००रु. ठेवणे शक्य झाले आहे.

मे.के.जोशी आणि कंपनी, पुणे हे श्रीवासुदेवनिवास, पुणे यांच्यशी दीर्घकाल संबंधित आहेत आणि भक्तपरिवारांपैकीं आहेत. त्यांनी नेहमीच्या आपुलकीने, तत्परतेने आणि कुशलतेने ह्या ग्रंथाचे उत्तम मुद्रण केल्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

यांत लेखक व वाचक या दोघांचाही लाभ होईल अशी अपेक्षा आहे. द्विसाहस्रीरूप ग्रंथात्म्याची ही सेवाच आहे. प.पू.सद्गुरु योगिराज श्रीगुळवणीमहाराजांनी ती मान्य करावी आणि आपल्या कृपेची साउली निरंतर आमच्यावर धरावी हीच प्रार्थना!

**वासुदेव व्यंकटेश देशमुख.**
ए१-४०१, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ,
औंध, पुणे ४११००७. भाद्रपद शुक्ल ९, शके १९३५.

## प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनी.

'नयन चेंबर्स', २रा मजला, पारकर वाडा, दांडिया बाजार, वडोदरा. दूरध्वनि- ०२६५-२४३१५६९
श्रीवासुदेवनिवास, ४२/१७, एरंडवणे, कर्वे पथ, पुणे ४११००७. दूरध्वनि ०२०-२५४५५५८४

महान् दत्तावतारी संत प.प.श्री. वासुदेवानंदसरस्वती (टेम्बे) स्वामीमहाराज यांचे जीवन, कार्य आणि वाङ्मय यांचा प्रचार तसेच प्रसार करण्याच्या हेतूने, १९ ऑक्टोबर, २००२ कोजागिरी पौर्णिमेच्या के शुभ दिनी, श्रीमहाराजांचे पावन समाधिस्थान श्रीगरुडेश्वर येथे, भारतांतील प्रमुख श्रीदत्तसंस्थांच्या प्रतिनिधिनींनी प.प. श्री. वासुदेवानंद सरस्वती (टेम्बे) स्वामी महाराज प्रबोधिनीची स्थापना केली. साठ वर्षांपूर्वी हैद्राबाद (आं.प्र) येथे श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मशताब्दीच्या उत्सवांत त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचे प्रकाशन करीत असतां प.पू. योगिराज श्री. वामनरावजी गुळवणी महाराज यांनी अशा प्रकारची एक अखिल भारतीय संस्था असावी असा विचार व्यक्त केला होता. त्याच्या आधारेच या प्रबोधिनीची प्रमुख उद्दिष्टे निश्चित करण्यात आली. (१) प.प. थोरल्या महाराजांच्या समग्र ग्रंथांचे प्रकाशन. (२) ह्या ग्रंथांचे विविध भाषांत अनुवाद. (३) संगणक, इंटरनेट इत्यादि आधुनिक माध्यमांतून श्रीस्वामीमहाराजांच्या जीवन, कार्य आणि साहित्य यांचा प्रसार. (४) श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचे अध्ययन आणि संशोधन यांचा विद्यापीठे आणि महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत व्हावा असा प्रयत्न करून, त्या त्या संस्थांना आवश्यक सहकार्य देणे. (५) ह्या प्रबोधिनीत अधिकाधिक श्रीदत्त संस्थानांना समाविष्ट करून श्रीस्वामीमहाराजांच्या साहित्याचे प्रकाशन, प्रचार व वितरण यांकरिता त्यांचे साह्य मिळविणे. ह्या सर्व संस्थांना एका सौहार्दपूर्ण सूत्रांत गठित करून श्रीदत्तसंप्रदायाच्या विकासासाठी कार्यान्वित करणे. (६) श्रीस्वामीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल झाला आहे. ज्या स्थानांत महाराजश्रींचा निवास झाला - विशेषतः त्यांचे चातुर्मास जिथे जिथे संपन्न झाले, त्या स्थानांत त्यांचे स्मारक निर्माण

करून  नित्य पूजा तसेच महाराजांच्या वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रचाराची सोय करणे.

आज अकरा वर्षानंतर या प्रबोधिनीच्या कार्याची फळे दृग्गोचर होत आहेत. प.प.श्रीटेंबे स्वामी महाराजांचे उपलब्ध सर्व मराठी व संस्कृत ग्रंथ आतां प्रबोधिनीच्या संलग्न संस्थांतून उपलब्ध आहेत. तसेच ते www. shrivasudevanandsaraswati.org या इंटरनेट स्थळावरही उपलब्ध आहेत. श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे मराठी व गुजराती अनुवाद पूर्वीपासूनच उपलब्ध आहेत. आतां द्विसाहस्री, दत्तमाहात्म्य व पंचपाक्षिक या ग्रंथांचे हिन्दी अनुवाद प्रकाशित झाले आहेत. श्रीस्वामिमहाराजांच्या प्रमुख संस्कृत ग्रंथांची तेलुगु आणि कानडी लिपीतील संस्करणे निघाली आहेत. अधिकाधिक भाषांतून श्रीमहाराजांच्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठी प्रबोधिनी प्रयत्नशील आहे. सांप्रतच्या श्रीस्वामींच्या समाधिशताब्दि वर्षात भारतभर विशेष कार्यक्रमांचे आयोजन होत आहे.

प्रबोधिनीच्या ह्या पुण्यकार्यांत सर्व स्वामिभक्तांनी आणि दत्तभक्तांनी सहभागी व्हावे अशी विनंति या निवेदनाद्वारे आम्ही करीत आहो. यथाशक्ति द्रव्यसेवा, वाङ्मयीन सेवा, सामूहिक तसेच वैयक्तिक उपासना इत्यादि प्रकारे या देवकार्यांत योगदान करावे. अकरा हजार किंवा अधिक रकमेचे दान देणाऱ्यांना प्रबोधिनीचे आश्रयदाता होतां येते. तसेच पांचशे रुपये देणाऱ्यांना आजीव सदस्यत्व मिळते. उदार आणि सत्प्रवृत्त दत्तभक्तांना आवाहन आहे की प.प.श्रीस्वामीमहाराजांच्या दत्तसमर्पित जीवनांतून प्रवाहित झालेल्या ह्या दत्तभक्तीच्या पावन गंगेत अधिकतम योगदान करून परमश्रेय साधून घ्यावे.

**प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीविरचितं**

**श्रीगुरुचरितम्। सटीक मराठी भाषांतर.**

# अनुक्रमणिका.

(विषयांपुढील कंसांतील आंकडे श्लोकांचे आहेत)

## श्रीगुरुस्तुतिः। : १-३३ :



## ज्ञानयोगः।

### प्रथमोऽध्यायः। चरितानुसंधानम्। : ३४-६२ :

## द्वितीयोऽध्यायः। गुरुशिष्यचरितानुकथनम्। : ६३-८० :

नामधारकाची सिद्धमुनीशी भेट व संवाद (१-६) : सद्गुरूंचे माहात्म्य व संशयाचा भक्तीला अडसर (७-१०) : युगनिरूपण आणि कलीला ब्रह्मदेवाचा उपदेश (११-२१) : दीपकाची गुरुसेवा (२२-४७) : दीपकाला विष्णूंचे वरदान आणि त्याच्यावर गुरूंची कृपा (४८-५७) : दीपकाख्यानाचा समारोप (५८-६३).

## तृतीयोऽध्यायः। दत्तावतारकथनम्। : ८१-१०१ :

गुरुकथा भवसागरांतील नौका (१-७): अत्रि आणि अनसूया (८-१३) : नारदकृत अनसूयास्तवनाने रुष्ट देवींच्या शांतवनासाठी ब्रह्मा, विष्णु आणि महेश अत्रिऋषींच्या आश्रमांत (१४-१६) : अनसूयेच्या पातिव्रत्यप्रभावाने तिन्ही देवांना बालकत्व.(१७-२४) : अनसूयेच्या दुधाने तीनही देवांची तृप्ती.(२५- ३०) : अत्रिऋषीकृत स्तुति.(३१-३४) : तिघांचे अत्रि आणि अनसूया यांना वरदान आणि तिघांचे नामकरण. (३५-४१) : अंबरीषाची कथा. (४२-५७).

## चतुर्थोऽध्यायः। दत्तलीलाकथनम्। : १०२-१४३ :

श्रीदत्त-यदुसंवाद 'अवधूतगीता'. (१-४०) : प्रह्लादावर अनुग्रह. (४१-४४) : कार्तवीर्याला अष्टांगयोग आणि आत्मज्ञान यांचा उपदेश. (४५-५७).

## पञ्चमोऽध्यायः। श्रीपादावतारः। : १४४-१५९

उपोद्घात (१-२) : परमेश्वर पक्षपाती आहे कां?(२-४) : सुमतिब्राह्मणीला पुत्रप्राप्तीचे वरदान (५-१४) : श्रीपादांचा जन्म (१५-२१) : श्रीपादश्रीवल्लभांचा मातेला उपदेश आणि गृहत्याग (२२-२५) : दोन्ही भावांच्या व्यंगांचा परिहार.(२६-२७) : मातेला स्वरूपदर्शन, (२७-३२) बंधूना उपदेश, काशीला प्रयाण. (३३-३६).

## षष्ठोऽध्यायः। गोकर्णवर्णनम्। : १६०-१७४

मातेसाठी रावणाचा कैलास आणण्याचा उद्यम.(१-५) : रावणाच्या संगीतसेवेने शंकराकडून प्राणलिंगाचे दान.(६-१२) : रावणाला फसवून गोकर्णांत लिंगाची स्थापना.(१३-३१) : मित्रसह राजाची कथा.(३२-३७) : चंडालीचे आख्यान.(३८-५१) : गोकर्णमाहात्म्य.(५२-५४).

## सप्तमोऽध्यायः। श्रीपादमहिमावर्णनम्। : १७५-१८७

विद्वान् ब्राह्मणाच्या मंदमति मुलाची कथा (१-११) : शनिप्रदोषाचे आख्यान (१२-२७) : अंबिकेच्या पुत्राला वरदानाने सुविद्य केले.(२८-३०): अंबिकेच्या प्रदोषव्रताचे फल देण्यासाठी पुनरावतार (३१-३६): ब्राह्मण व्यापारी भक्ताचे चोरांपासून रक्षण (३७-४७): कुरुगड्डीचे आणि श्रीपादश्रीवल्लभांच्या भक्तीचे माहात्म्य (४८-५०).

## अष्टमोऽध्यायः। श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनम्। : १८८-२१५

अंबिकेचा पुनर्जन्म आणि माधवब्राह्मणाशी विवाह.(१-६) : धर्माला अनुकूल कामाचे अनिंद्यत्व (७) : नृसिंहसरस्वतींचा अवतार, जन्मतः ॐकाराचा उच्चार (८-१५): बाल्यावस्थेतील चमत्कार आणि लीलेने मूक राहणे.(१६-२१): लोहाचे सोने करून मुंज लावण्याचा मातापित्यांना संकेत.(२१-२४) : उपनयनानंतर लगेच वेदपठण (२५-२६) : संन्यासाठी आईवडिलांच्या अनुज्ञेची मागणी (२७-२९) : दुःखी मातेला उपदेश.(३०-४१) : मातेला आपल्या स्वरूपाचे दर्शन, पुत्रप्राप्तीचे वरदान; मातेने केलेली स्तुति.(४२-४५) : मातेच्या इच्छेनुसार एक वर्ष घरी राहून शिष्यांना अध्यापन.(४६-४७) : आईला जुळे झाल्यावर काशीला प्रयाण (४८-५२) : काशीतील तपाचरण आणि तेथील संन्याशांची प्रार्थना (५३-५७) : कृष्णसरस्वतींकडून संन्यास घेऊन संन्यासमार्गाचा प्रसार.(५८-६०) : महावाक्यांसहित संन्यासधर्माचा आणि योगाचाउपदेश (६१-६७) : गुरुपरंपरा (६८-७७).

## नवमोऽध्यायः। तीर्थयात्रोद्देशः। : २१६-२४३ :

श्रीगुरूंचे शिष्य (१-४) : कारंजाला मातृदर्शन (५-११) : भगिनीशी संवाद (१२-१५) : गोदातीरावर संचार (१६-१७) : पोटशूळार्त ब्राह्मणाला अभय. (१८-२५) : सायंदेवाच्या घरीं भिक्षाग्रहण. (२६-४०) : सायंदेवाचे यवनापासून रक्षण (४१-४८) : उपासनानिरूपण (४९-५४) : योगभूमी आणि सद्गुरुमहिमा (५५-५७) : आश्रमधर्माचे निरूपण. (५८-६९) : तीर्थयात्रानिरूपण. (७०-८३).

## दशमोऽध्यायः। गुरुभक्त्यनुशासनम्। : २४४-२५५ :

गुरूच्या त्यागाच्या दोषाचे निरूपण. (१-८) : गुरूचे स्वरूप (९-१०) : धौम्य ऋषी आणि त्यांच्या तीन शिष्यांची कथा.(११-३६) : गुरुत्यागी ब्राह्मणाचा उद्धार (३७-४४).

## एकादशोऽध्यायः। कृष्णापञ्चगङ्गासङ्गमोत्कर्षकथनम्। : २५६-२७२ :

विद्येचे माहात्म्य (१-४) : मंदबुद्धी ब्राह्मणाचा भुवनेश्वरीसमोर जिह्वाछेद.(५-६) : देवीच्या आज्ञेने त्याची श्रीगुरूंकडे शरणागती. (७) : त्याच्यावर श्रीगुरुप्रसाद.(८-१०) : श्रीगुरूंचे कृष्णापंचगंगासंगमावर आगमन. (११-१६) : घेवड्याचा वेल कापून ब्राह्मणाचे दारिद्र्यहरण.(१७-२६) : श्रीगुरूंची भिक्षावृत्ती. (२७-२८) : औदुंबरमाहात्म्य. (२९-३२) : गंगानुजावर अनुग्रह.(३३-४२) : गंगानुजाला त्रिस्थळीयात्रा. (४३-४६) : कृष्णापंचगंगासंगमाचा उत्कर्ष व गाणागपूरास गमन. (४७-५५).

## द्वादशोऽध्यायः। प्रेतसंजीवनम्। : २७३-२९४ :

श्रीगुरूंचे स्वरूप (१-४) : अपत्यनाशाची कारणे. (५-१३) : ब्राह्मणीची भूतबाधा दूर करून तिला पुत्रलाभ. (१४-३२) : ब्राह्मणीच्या ज्येष्ठ पुत्राचा मृत्यू आणि तिचा शोक.(३३-३९) : ग्रामवासीयांचे न ऐकतां तिचे पुत्राला कवटाळून राहणे.(४०-४५) : तापसाचा उपदेश.(४६-५४): ब्राह्मणीला स्वप्नांत दर्शन व प्राणाचे निरूपण.(५५-६०) : पुत्राचे संजीवन.(६१-६६)

## त्रयोदशोऽध्यायः। भीमामरजासङ्गमनिवासः। : २९५-३०८ :

वांझ म्हैस दुभती केली. (१-१०) : राजाच्या प्रार्थनेला मान देऊन गाणगापुरांत आगमन.(११-१८) : गांवाच्या वेशीजवळ ब्रह्मराक्षसाचा उद्धार.(१९-२२). राजाने अर्पण केलेल्या मठांत निवास.(२३-२५). : त्रिविक्रम भारतीला विश्वरूपदर्शन (२६-४९).

## कर्मयोगः। चतुर्दशोऽध्यायः। वेदोपदेशः। : ३०९-३२९ :

कर्म हे ज्ञानाचे साधन कसे आहे. (१-२) : संस्कारांचे महत्त्व आणि विविदिषा. (३-५) : विद्येचा गर्व झालेल्या ब्राह्मणांचे त्रिविक्रम भारतीला आह्वान.(६-२०) : त्रिविक्रमकृत श्रीगुरुस्तुति. (२१-२३). श्रीगुरूंचा गर्विष्ठ ब्राह्मणांना उपदेश आणि वेदनिरूपण.(२४-४५) : चंडालाद्वारें विद्वानांचे गर्वहरण.(४६-५६) : विद्वानांचा पश्चात्ताप व त्यांना उःशाप. (५७-६२).

## पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाकः। : ३३०-३५१ :

चंडालयोनी कुणाला प्राप्त होते? (१-११) : मृत्यूनंतर जीवाची गति. (११-१५) : कोणत्या पापाने कोणत्या योनी प्राप्त होतात. (१६-१९) : पापांपासून रोगांचा उद्भव.(२०-२१) : चोरीची फळे.(२१-२३) : व्यभिचाराची फळे.(२३-२५) : प्रायश्चित्त प्रकरण. (२६-४१) : पतिताचे ज्ञानहरण. (४२-५१) : भस्ममाहात्म्य. (५२-८१).

## षोडशोऽध्यायः। मृतसंजीवनम्। : ३५२-३८३ :

श्रेयस् आणि प्रेयस् मार्ग.(उपोदघात) : सद्गुरूंच्या अगम्य लीला.(१-३) : गोपीनाथाचा पुत्र दत्त याची कथा.(४-१८) : गाणगापुरांत प्रवेश करतांना त्याचा मृत्यू आणि सावित्रीचा शोक.(१९-३०) : साधूच्या रूपांतील श्रीगुरूंचा सावित्रीला उपदेश.(३१-३९) : स्त्रियांचे धर्म. (४०-५७) : विधवाधर्मनिरूपण. (५८-६५) : सहगमनाचे माहात्म्य. (६६-७०) : सावित्रीचा सहगमनाचा निर्धार. (७१-८१) : सहगमनापूर्वी श्रीगुरूंच्या दर्शनाला गेलेल्या साध्वीने केलेली स्तुति. (८२-८४): सावित्रीच्या पतीचे संजीवन. (८५-९९).

## सप्तदशोऽध्यायः। दम्पतीगुरुसंवादः। : ३८४-४०९ :

रुद्राक्षधारणाचा महिमा.(१-७) : वेश्यासतीचे उपाख्यान. (८-२२) : रुद्राध्यायाचे माहात्म्य. (२३-४१) : स्त्रियांना मंत्राचा उपदेश करूं नये याविषयी कचाख्यानाचे निरूपण.(४२-६७) : सोमवारव्रत आणि सीमंतिनीचे उपाख्यान.(६८-१०६).

## अष्टादशोऽध्यायः। कर्मकाण्डकथनम्। : ४१०-४६२ :

परान्नत्यागी ब्राह्मणाच्या कर्कशा पत्नीचा स्वभावपालट.(१-१०) : परान्नाविषयी ग्राह्याग्राह्य विचार. (११-२०) : पराशरप्रणीत कर्ममार्गनिरूपण. (२१-२५) : आचारधर्माची परिभाषा. (२६-५०) : शौच आणि स्नान. (५१-६७) : भस्म, मृत्तिका, चंदन, मुद्रिका यांचे धारण (६८-७२) : आचमन.(७३-८१) : संध्यावंदन. (८२-१०२) : गायत्रीमंत्राचा जप. (१०३-१०८) : गुरूंचे अभिवादन. (१०९-११२) : अग्नीची उपासना. (११३-११८) : गृहशुद्धि. (११८-१२१) : देवपूजा. (१२२-१४५) : ब्रह्मयज्ञ. (१४६-१४८) : तर्पण. (१४९-१५१) : वैश्वदेव आणि बली. (१५२-१५५) : भोजनविधि. (१५६-१७४) : निद्रा.(१७५-१७९) : संभोग. (१८०-१८५) : विचाराचार. (१८६-१८८).

## भक्तियोगः। एकोनविंशोऽध्यायः। भक्तिमहिमावर्णनम्। : ४६३-५०१ :

सर्वसाधनसाधक भक्ति. (१-६) : भास्करब्राह्मणाची कथा.(७-३०) : अश्वत्थमहिमा. (३१-४८) : साठ वर्षांच्या वंध्येला पुत्रप्राप्ती. (४९-७३) : कुष्ठी नरहरी ब्राह्मणाची कथा.(७४-८४) : शबराची शिवभक्ति.(८५-९८) : शुष्क काष्ठाला पालवी आणि नरहरीचा कुष्ठपरिहार. (९९-१०१) : नरहरीकृत श्रीगुरुस्तोत्र. (१०२-११०) : समारोप.(१११-११६).

## विंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५०२-५३० :

सायंदेवाची परीक्षा.(१-२३) : गुरुसेवेची दुष्करता.(२४-२८) : त्वष्टापुत्राची कथा आणि काशीयात्रानिरूपण. (२९-५६) : सायंदेवकृत नृसिंहसरस्वतीस्तोत्र.(५७-६६) : अनंतव्रताचे निरूपण.(६७-१११).

## एकविंशोऽध्यायः। भक्तिवर्णनम्। : ५३१-५५५ :

तंतुकभक्ताला श्रीशैल्यदर्शन आणि श्रीशैल्यमाहात्म्य.(१-३६) : देवीच्या निरोपाने आलेल्या नन्दी ब्राह्मणाचा कुष्ठपरिहार.(३७-५६) : अवशिष्ट कुष्ठ जाण्यासाठी श्रीगुरूंच्या आज्ञेने त्याने केलेली स्तुति. (५७-९१) : नरहरी कवीला कल्लेश्वराठायीं दर्शन आणि अनुग्रह.(९२-१०३).

## द्वाविंशोऽध्यायः। क्षेत्रमाहात्म्यवर्णनम्। : ५५६-५८४ :

भगवंताचे भक्तवात्सल्य आणि भक्तपराधीनता.(१-१२) : आठ रूपांनी आठ भक्तांच्या गांवी दिवाळी साजरी.(१३-३३) : शेतकरी भक्ताचे शेत अमाप पिकविले.(३४-७२) : गाणगापूरच्या अष्टतीर्थांचे निरूपण. (७३-१०२).

## त्रयोविंशोऽध्यायः। : ५८५-६१९ :

पाप-तापहारी श्रीगुरुचरित्र मोक्षाहूनही ग्राह्य.(१-९) : कुरुगड्डीच्या परीटाला राज्याचे वरदान.(१०-१८) : त्याचा बिदरचा राजा म्हणून पुनर्जन्म.(१९-२६) : स्फोटकग्रस्त राजाला ब्राह्मणाचा उपदेश व ऋषभमुनींची कथा.(२७-६५) : म्लेच्छ राजाच्या स्फोटकाचे शमन.(६६-७७) : म्लेच्छ राजाच्या गांवी गमन व त्याचा उद्धार.(७८-१०५) : श्रीशैलयात्रा व गाणगापुरच्या मठांत शाश्वत वास.(१०६-११२) : ग्रंथाचा उपसंहार आणि मंगलाचरण.(११२-११८).

## योगरहस्यम्। : ६२०-६४० :

## बोधरहस्यम्। : ६४१-६६३ :

## सप्ताहपाठपद्धति -

प्रथमेऽह्नि, चतुर्थाध्यायांत, द्वितीये नवमाध्यायांत, तृतीये चतुर्दशाध्यायान्त, पंचमे एकोनविंशाध्यायन्त, षष्ठे एकविंशाध्यान्त, सप्तमे त्रयोविंशाऽध्यायान्त पठित्वा रहस्यद्वयं पठेत्। प्रत्यहमादौ ग्रन्थपूजनोत्तरं श्रीवैष्णवेत्यादिस्तुतयः पठेत्। अन्ते चोत्तरपूजनं कृत्वा 'रसज्ञा वशे'त्यपराधक्षमापनस्तोत्रं पठेत्।

पहिल्या दिवशीं यथाविधि संकल्प करून तसेच ग्रंथपूजन करून वाचनाला आरंभ करावा. प्रतिदिनी आरंभी श्रीगुरुस्तुति वाचावी व मग त्या दिवशींचे अध्याय वाचावेत. **१ल्या दिवशी ४थ्या अध्यायापर्यंत, २न्या दिवशी ९ अध्यायापर्यंत, ३न्या दिवशी १४व्या अध्यायापर्यंत, ४थ्या दिवशी १७ व्या अध्यायापर्यंत, ५ व्या दिवशी १९ व्या अध्यायापर्यंत, ६ व्या दिवशी २१ व्या अध्यायापर्यंत आणि ७ व्या दिवशी २३ व्या अध्यायापर्यंत वाचून योगरहस्य आणि बोधरहस्य वाचून उत्तरपूजा करावी.** वाचनानंतर रोज 'रसज्ञा वशा तारकं स्वादु लभ्यं..' हे क्षमापराधनस्तोत्र वाचावे. पारायणकालांत श्रीगुरुचरित्राच्या पारायणाचे सर्व शुचिता-आहार-विहारादि नियम पाळावेत.

**या ग्रंथाचे मराठी भाषांतर स्त्रियांना वाचण्यास हरकत नाही.**

या ग्रंथाचे एकाह्न पारायणसुद्धां करतां येते. संकल्प व ग्रंथपूजन करून श्रीगुरुस्तुतीपासून आरंभ करून बोधरहस्यापर्यंत वाचन पुरे झाल्यावर रसज्ञा वशा  स्तोत्राचा पाठ करून उत्तरपूजा करावी.

# श्रीगुरुस्तुतिः

मंगलाचरण

**श्रीवैष्णवैशगाणेश-सौर्यशाक्त्यादिरूपधृक् । दत्तात्रेयोऽस्त्वजोऽनन्तः सदा मे हृदि सद्गुरुः ।।१।।**
**योऽजोऽनन्तोऽगुणोऽरूपो निस्तृडेकोऽक्रियोऽसृजत् । विश्वं धृत्वा षोडशांशं पुंरूपं योगमायया ।।२।।**
**दृश्यते ज्ञानदृष्ट्या यत्सहस्राक्षिशिरोऽङ्घ्रि सत् । रूपं यदङ्गसंस्थानैर्लोकव्यासः प्रकल्प्यते ।।३।।**

श्री+वैष्णव+ऐश+गाणेश+सौर्य+शाक्त्य+आदि+रूप+धृक् अजः अनन्तः दत्तात्रेयः सदा मे हृदि अस्तु।१। यः अजः अनन्तः अगुणः, अरूपः, निस्तृट्, एकः अक्रियः योग+मायया षोडश+अंशं पुं+रूपं धृत्वा विश्वं असृजत्।२। यत् (पुंरूपं) सहस्र+अङ्घ्रि+शिरः सत् रूपं ज्ञानदृष्ट्या दृश्यते। यत्+अङ्ग+संस्थानैः लोक+व्यासः प्रकल्प्यते।३।

पहिला श्लोक हे देवतावाचक मंगल आहे. *देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः। सर्वे ते नैव निंद्याः स्युर्लिपितो गणितोपि वा। मंगलाचरणं शिष्टाचारात्फलदर्शनाच्छ्रुतितश्च।* (सांख्यदर्शन ५।१). ज्ञान, ऐश्वर्य आदि वैभवाने युक्त अशा विष्णु, शिव, गणेश, सूर्य, देवी (शक्ति) तसेच इंद्र, अग्नि (आदि) मूर्ति आपल्या मायेच्या सामर्थ्याने धारण करणारे पण तत्त्वतः अनादि आणि अनंत असणारे सद्गुरू दत्तभगवान् नित्य माझ्या चित्तांत असोत.१.

**दत्तात्रेयांचे स्वरूप.** असा जो जन्मरहित, अनंत, निर्गुण, निरिच्छ, एकमेवाद्वितीय, अक्रिय परमात्मा त्याने आपल्या योगमायेने सोळा अंशांचे (११ इंद्रिये आणि पंचमहाभूते) विराट पुरुषरूप धारण करून विश्व निर्माण केले. अनंत पाय आणि अनंत शिरे असलेले ते स्वरूप (योगीजनांनाच) ज्ञानचक्षूंनी दिसते. या विराट रूपाच्या अवयवांपासूनच पातालादि लोकांचा विस्तार झाला आहे.२-३.

**नानावतारबीजं यदनन्तं यत्कलामुखैः । देवतिर्यङ्मुखं सृष्टमस्वतन्त्रं जगत्पुरु ।।४।।**
**गोभिः स्वार्थादानमीश-सृष्टं नेशात्परं क्वचित् । देहेन्द्रियात्मजीवोत्थौ रागद्वेषावियन्तु भित् ।।५।।**
**भूतेट् सोऽजोऽव्ययात्मापि संभवत्यात्ममायया । श्रेयोऽर्हसाधुगुप्त्यै स्वप्रकृतिस्थो युगे युगे ।।६।।**

यत् अनन्तं नाना+अवतार+बीजम्। यत्+कला+मुखैः देव+तिर्यक्+मुखं अस्वतन्त्रं पुरु जगत् सृष्टम्।४। गोभिः स्व+अर्थ+आदानं ईश+सृष्टम्। ईशात् परं न क्वचित्। देह+इन्द्रिय+आत्म+जीव+उत्थौ राग+द्वेषौ इयं तु भित्।५। सः भूत+ईट् अजः अव्ययः अपि आत्म+मायया स्व+प्रकृति+स्थः श्रेयः+अर्ह+साधु+गुप्त्यै युगे युगे संभवति।६।

ह्याच अनेक अवतारांच्या बीज असलेल्या अनंत स्वरूपाने आपल्या ब्रह्मदेव, मरीचि आदि कलांच्या द्वारा देव-तिर्यगादि योनींनी युक्त अशा अपरिमित अशा जगताची निर्मिति केली.४. (ह्या जगांत) इंद्रियांची आपापले विषय ग्रहण करण्याची क्षमता परमेश्वरानेच निर्मिली आहे. सर्वांचे अधिष्ठान अशा ईश्वराखेरीज (ह्या सृष्टीत) कांहीच नाही. तरी पण देह आणि इंद्रिये यांच्याशी तादात्म्य होऊन त्यांच्या अभिमानाने जीवाला राग (आकर्षण) आणि द्वेष प्राप्त झाले. हेच भेदाचे मूळ होय. म्हणजेच जीवसृष्टी आणि ईश्वरसृष्टी असा भेद भासू लागला. ह्या भेदामुळेच जीव आपल्या सच्चिदानंदैकरस स्वरूपाला विसरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी अशी विपरीत भावना करतो.५. तोच सर्व भूतांचा ईश्वर, अजन्मा आणि अक्षर असूनही, आपल्या आपल्या प्रकृतीचा, म्हणजेच मायेचा आश्रय करून, मोक्षाला योग्य अशा साधूंच्या रक्षणासाठी जन्म घेतो. *(अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया।।.. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।। श्री.भ.गी.४।६, ८.)*६.

**श्रुत्वा तत्कर्म निर्द्वन्द्वो मुच्यते कर्मबन्धनात् । न तथा कर्मसिद्धीप्सुर्द्वन्द्वात्मा भ्रान्तहृन्नरः ।।७।।**
**गुणकर्मभिदा सृष्ट-चातुर्वर्ण्यस्य सोऽव्ययः । कर्ताप्यकर्ता यैर्ज्ञातो बध्यन्ते कर्मभिर्न ये ।।८।।**
**भूभारभूततद्द्वेष्य-घाताय विविधास्तनूः । धृत्वा कण्टकवन्मत्वा कृतकार्यो जहात्यसौ ।।९।।**
**अस्यैवापूर्णकृत्याः स्युस्तन्वस्तासूत्तमोत्तमा । तनुरेकास्ति दत्ताख्या कृपासूः स्मर्तृगामिनी ।।१०।।**

तत्+कर्म श्रुत्वा निर्द्वन्द्वः (यथा) कर्म+बन्धनात् मुच्यते तथा कर्म+सिद्धि+ईप्सुः द्वन्द्व+आत्मा भ्रान्त+हृत् नरः न (मुच्यते)।७। गुण+कर्म+भिदा सृष्ट+चातुर्वर्णस्य सः अव्ययः कर्ता अपि यैः अकर्ता ज्ञाता, ये कर्मभिः न बध्यन्ते, भू+भार+भूत तत्+द्वेष्य+घाताय असौ विविधाः तनूः धृत्वा कृत+कार्यो कण्टकवत् मत्वा जहाति।८-९। अस्य एव अपूर्ण+कृत्याः तन्वः स्युः। तासु एका उत्तम+उत्तमा कृपासूः स्मर्तृ+गामिनी तनुः अस्ति।१०।

त्या (त्या अवतारांच्या साधुरक्षणात्मक) चरित्राचे निष्कामतया श्रवण केल्याने साधु जसा कर्मबंधनांतून सुटतो तसा कर्मफलाची अभिलाषा करणारा भ्रांतचित्त श्रवणपराङ्मुख असाधु मुक्त होत नाही.७. सत्त्व, रज आणि तम हे गुण आणि शमादि कर्म यांच्या भेदानुसार चार वर्णांची निर्मिती करणारा तो परमात्मा असंग आणि उदासीन असल्याने अकर्ताच आहे असे जाणल्याने स्वकर्मांनी जे बांधले जात नाहीत,८. त्या (साधूंचा) द्वेष करणारे, भूमीला भारभूत झालेले जे दुष्ट, त्यांचा विनाशासाठी विविध शरीरे धारण करून हा प्रभू (त्या त्या अवतारांचे) कार्य पूर्ण होतांच त्यांना (कांटा काढण्यासाठी घेतलेल्या) कांट्याप्रमाणे टाकून देतो. त्या त्या देहांचे विसर्जन करतो.९.

**अवताररहस्य.** (असे जर आहे तर नर, नारायण, नारद, सनक इत्यादि कसे चिरंजीव आहेत अशी शंका अपेक्षून महाराज सांगतात) ज्यांचे कार्य अजून अपूर्ण आहे असे ह्या ईश्वराच्या अनेक मूर्ति आहेत. त्यांतीलच एक उत्तमोत्तम श्रीदत्त या नांवाची तनू कृपाळू आणि स्मर्तृगामी अशी आहे.१०.

**मुक्तैर्मुमुक्षिभिश्चान्यैर्ध्येया नान्येदृशी कलौ । कामदा यस्य कस्यापि स्मृतिगामिन्यनुक्षणम् ।।११।।**
**विश्वं ततान योऽव्यक्तस्तद्यत्स्थं यो न तत्स्थितः । तद्यत्स्थं नैश्वराद्योगात्तद्भृत्तत्स्थो न वायुवत् ।।१२।।**
**मावशाद्योऽवशोऽभीक्ष्णं व्यसृजत्तदबंधनः । येनाध्यक्षेण मा सूते जगद्वेदामलं न यम् ।।१३।।**
**नृरूपेणावतीर्णं यत्तत्त्वाज्ञोऽसुरभावगः । न वेत्ति योगगम्यं यं सद्धर्मत्राणकारणम् ।।१४।।**

कलौ मुक्तैः मुमुक्षुभिः च अन्यैः ध्येया ईदृशी कामदा, अनुक्षणं स्मृतिगामिनी अन्या न।११। यः अव्यक्तः विश्वं ततान, तत् यत्स्थं, यः न तत्+स्थितः। तत् न यत्+स्थं ऐश्वरात् योगात् वायुवत् तत्+भृत् न तत्+स्थः।१२। मा+वशात् यः अवशः अभीक्ष्णं तत् अबन्धनः व्यसृजत्। मा येन अध्यक्षेण जगत् सूते यं अमलं न वेद।१३। यत्+तत्त्व+अज्ञः असुर+भाव+गः नृ+रूपेण+अवतीर्णं योगगम्यं सत्+धर्म+त्राण+कारणं न वेत्ति।१४।

मुक्त, मुमुक्षु आणि विषयी यांनी चिंतण्यायोग्य, स्मरणमात्रे संतोष पावून क्षणमात्रांत प्रत्येकाच्या कामना पुरविणारे कलियुगांत दुसरे दैवत नाही.११. विश्वाचा विस्तार करणारा तो ज्ञान, ऐश्वर्य, बल, तेज आणि वीर्यानी युक्त असा अव्यक्त (परोक्ष) पुरुष ज्याच्या ठायीं ते (विश्व) स्थित आहे, त्यांचे पोषण करतो आहे. तरीसुद्धां जो जगाला धारण करणारा ईश्वर वायूप्रमाणे सर्वव्याप्त असूनही त्या विश्वांत स्थिरावत नाही. श्रीमच्छंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे मायेच्या अध्यासाने हे अखिल जगत् मी विस्तारलेले असल्याने ते सर्व जीव माझ्याच आधाराने स्थिर आहेत; पण मी त्यांच्यात नाही. शिंपल्यावर चांदीचा भास होतो. त्या शिंपल्यांतच चांदी आहे; पण चांदीत मात्र शिंपल्याचा अंशही नसतो. म्हणूनच भगवंत म्हणतात हे सर्व जीव माझ्यांत राहतात. हे सर्व इंद्रियगोचर जगत् इंद्रजालाप्रमाणे मिथ्या आहे.१२. मायेच्या योगाने पण मायेला वश न होता तिच्या बंधनाच्या पलीकडे असणारा (परमात्मा) ह्या वैविध्यपूर्ण जगाचे सृजन करतो. ज्याच्या आधिपत्याखाली माया ह्या जगताला जन्म देते; ते जगत् मात्र त्या शुद्ध ईश्वराला जाणत नाही.१३. त्या संत आणि धर्म यांच्या रक्षणासाठी मनुष्यरूपाने अवतरलेल्या योगगम्य भगवंताला, त्याचे तत्त्व न जाणणारे, आसुरी संपत्तीने अभिभूत झालेले (दुष्ट जीव) ओळखत नाहीत.१४.

**सोऽन्वर्थाख्यानसूयात्रिपुत्रो जज्ञेऽज ईश्वरः । अचिन्त्याव्यक्तरूपोऽपि दत्तोऽर्च्यः स्मृतितोषणः ।।१५।।**
**परानन्दमयो विष्णुर्हृत्स्थोऽवेद्योऽप्यतीन्द्रियः । सदा सम्पूज्यते भक्तैर्भगवान् भक्तिभावनः ।।१६।।**
**अचिन्त्यस्य कुतो ध्यानं कूटस्थावाहनं कुतः। क्वासनं विश्वसंस्थस्य पाद्यं पूतात्मनः कुतः ।।१७।।**
**क्वानर्घोरुक्रमस्यार्घ्यं विष्णोराचमनं कुतः। निर्मलस्य कुतः स्नानं क्व निरावरणेऽम्बरम् ।।१८।।**

सः अनु+अर्थ+आख्यः अनसूया+अत्रि+पुत्रः ईश्वरः जज्ञे। अचिन्त्य+अव्यक्त+रूपः अपि स्मृति+तोषणः दत्तः अर्च्यः।१५। पर+आनन्द+मयः विष्णुः हृत्स्थः अवेद्यः अति+इन्द्रियः अपि भक्तिभावनः भगवान् भक्तैः सदा सम्पूज्यते।१६। अचिन्त्यस्य कुतः ध्यानम्? कूटस्थ+आवाहनं कुतः? विश्व+संस्थस्य क्व आसनम्? पूत+आत्मनः पाद्यं कुतः?।१७। अनर्घ+उरु+क्रमस्य अर्घ्यं क्व? विष्णोः आचमनं कुतः? निर्मलस्य कुतः स्नानं? निरावरणे अम्बरं क्व?।१८।

**दत्तात्रेयांच्या सगुण स्वरूपाची पूजनीयता.** स्वतःचेच दान करून आपले दत्त हे नाम सार्थक केलेला अनसूया आणि अत्रीचा पुत्रच ईश्वर आहे असे जाणा. अचिंत्य आणि अव्यक्त (मन आणि इंद्रियांच्या अतीत) रूपाच्या त्या स्मरणानेच संतुष्ट होणाऱ्या दत्ताचे पूजन करावे.१५. परमानंदस्वरूप तो विष्णु हृदयस्थ असूनही अतीन्द्रिय असल्याने जाणीवेच्या पलीकडे आहे. तरीही भक्तीने वश होणाऱ्या त्या भगवंताचे भक्तांनी श्रद्धेने नित्य पूजन केले पाहिजे.१६. **मानसपूजा.** ह्या मानसपूजेचा पूर्वार्ध श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या परापूजा ह्या स्तोत्राशी खूप जुळणारा आहे. अचिंत्याचे ध्यान कसे करतां येईल? अखंडतया एकरूपाने तिन्ही कालांना व्यापणाऱ्याचे आवाहन कसे करतां येईल?१७. ज्याचे पदकमल अनर्घ म्हणजे अमूल्य आहेत त्याला अर्घ्य कशाचे देणार? सर्वव्यापकाला आचमन काय द्यावे? शुद्धस्वरूपाला कुठले स्नान? आवरणातीताला वस्त्र कुठून आणावे?१८.

**स्वसूत्रस्य कुतः सूत्रं निर्मलस्य च लेपनम् । निस्तृषः सुमनोभिः किं किमक्लेद्यस्य धूपतः ।।१९।।**
**स्वप्रकाशस्य दीपैः किं किं भक्ष्याद्यैर्जगद्भृतः । किं देयं परितृप्तस्य विराजः क्व प्रदक्षिणाः ।।२०।।**
**किमनन्तस्य नतिभिः स्तौति को वागगोचरम् । अन्तर्बहिःप्रपूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ।।२१।।**
**सर्वतोऽपीत्यसंभाव्यो भाव्यते भक्तिभावनः । सेव्यसेवकभावेन भक्तैर्लीलानृविग्रहः ।।२२।।**
**तवेशातीन्द्रियस्यापि पारम्पर्याश्रुतां तनुम् । प्रकल्प्याश्मादावर्चन्ति प्रार्चयेऽर्चां मनोमयीम् ।।२३।।**

स्व+सूत्रस्य कुतः सूत्रम्? निर्मलस्य च लेपनम्? निस्तृषः सुमनोभिः किम्? अक्लेद्यस्य धूपतः किम्?।१९। स्व+प्रकाशस्य दीपैः किम्? जगत्+भृतः भक्ष्याद्यैः किम्? परितृप्तस्य किं देयम्? विराजः क्व प्रदक्षिणाः?।२०। अनन्तस्य नतिभिः किम्? वाक्+अगोचरं कः स्तौति? अन्तः+बहिः+परिपूर्णस्य उद्वासनं कथं भवेत्?।२१। इति सर्वतः अपि असंभाव्यः भक्तिभावनः लीला+नृ+विग्रहः भक्तैः सेव्य+सेवक+भावेन भाव्यते।२२। (हे) ईश, तव अति+इन्द्रियस्य अपि पारम्पर्या आश्रुतां तनूं अश्मादौ प्रकल्प्य अर्चन्ति। मनोमयीं अर्चां प्रार्चये।२३।

स्वसूत्राला (सर्वतंत्रस्वतंत्र अशा देवाला) सूत्र (यज्ञोपवीत) कुठले? निर्मलाला गंध लेपन कोणते द्यावे? तृष्णारहित परमात्म्याला फुलाचे काय महत्त्व? अक्लेद्य (पाण्याने न ओलावणाऱ्या) देवाला धूपाचा काय उपयोग? स्वयंप्रकाशाला दिवा कशासाठी दाखववावा? जगाचे पोषण करणाऱ्याला खाद्याची काय आवश्यकता? नित्यतृप्त भगवंताला काय दक्षिणा द्यायची? विराट पुरुषाला प्रदक्षिणा कशी करायची? अनन्ताला नमस्कारांनी काय होणार? आणि वाचेला अगोचर अशा देवाची स्तुति तरी कशी करणार? अंतर्बाह्य परिपूर्ण अशा ईश्वराचे विसर्जन कसे होईल?१९-२१. अशा सर्वतोपरी अकल्पनीय अशा भगवंताने लीलेने धारण केलेल्या नरदेहाची कल्पना करून, त्याला स्वामी मानून सेवकभावाने पुजावे; कारण तो भक्तीला पावतो.२२. (हे भगवंता) तूं अतींद्रिय असलास तरी गुरुपरंपरेने चालत आलेल्या पाषाणादि अष्टविध प्रतिमांनाच तुझे शरीर मानून अल्पबुद्धीचे भक्त पूजन करतात. मी ध्यानयोगासाठी, मनाची लवकर एकाग्रता होण्यासाठी ह्या आठ मूर्तींत उत्तम मानल्या गेलेल्या मानस मूर्तीचे तीव्रतेने पूजन करीत आहे.२३.

**कलसुश्लोकगीतेन भगवन्दत्त जागृहि । भक्तवत्सल सामीप्यं कुरु मे मानसार्चने ।।२४।।**
**श्रीदत्तं खेचरीमुद्रा-मुद्रितं योगिसद्गुरुम् । सिद्धासनस्थं ध्यायेऽभी-वरप्रदकरं हरिम् ।।२५।।**
**दत्तात्रेयाह्वयाम्यत्र परिवारैः सहार्चने । श्रद्धाभक्त्येश्वरागच्छ ध्यातधाम्नाञ्जसा विभो ।।२६।।**
**सौवर्णं रत्नजडितं कल्पितं देवतामयम् । रम्यं सिंहासनं दत्त तत्रोपविश यंत्रिते ।।२७।।**
**पाद्यं चंदनकर्पूर-सुरभि स्वादु वारि ते । गृहाण कल्पितं तेन दत्ताङ्घ्री क्षालयामि ते ।।२८।।**

(हे) भगवन् दत्त! कल+सुश्लोक+गीतेन जागृहि। (हे) भक्तवत्सल, मानस+अर्चने मे सामीप्यं कुरु।२४। सिद्ध+आसनस्थं खेचरी+मुद्रा+मुद्रितं अभी+वर+प्रदं योगि+सद्गुरुं हरिं ध्याये।२५। अत्र दत्तात्रेयाय परिवारैः सह अर्चने श्रद्धा+भक्त्या आह्वयामि। (हे) विभो ध्यात+धाम्ना अञ्जसा आगच्छ।२६। (हे) दत्त, सौवर्णं रत्नजडितं रम्यं देवतामयं सिंहासनं कल्पितम्। तत्र यंत्रिते (सिंहासने) उपविश।२७। चंदन+कर्पूर+सुरभि+स्वादु वारि ते पाद्यं कल्पितं, तेन (हे) दत्त, ते अङ्घ्री क्षालयामि।२८।

**मानसमूर्तीची षोडशोपचार पूजा** - **(प्रबोध)** आपल्या चित्ताकर्षक आणि सुंदर कीर्तीचे गुणगान असलेल्या गीतांनी, हे दत्तप्रभू, आपण जागे व्हा आणि हे भक्तवत्सला ह्या मानसपूजेत माझ्यासमीप रहा.२४. **(ध्यान)** सिद्धासनावर बसून खेचरी मुद्रा धारण केलेल्या तसेच हातांनी वर आणि अभय दर्शविणाऱ्या योग्यांच्या सद्गुरु श्रीदत्तांचे मी ध्यान करतो. इथे द्विभुज मूर्तीचे ध्यान अभिप्रेत दिसते. स्तुतीच्या अंतींचे सविस्तर ध्यानही दिगंबर आणि द्विभुज असेच आहे.२५. **(आवाहन)** श्रीदत्तात्रेयांना परिवारासह ह्या पूजेसाठी मी श्रद्धेने आणि भक्तीने आवाहन करतो. हे सर्वव्यापी देवा, आपण शीघ्र या ध्यानमूर्तींत या.२६. **(आसन)** हे दत्ता, मी आपल्यासाठी हे सुवर्णाचे, देवतामय, यंत्रयुक्त रम्य सिंहासन कल्पिलेले आहे. त्यावर विराजमान व्हा.२७. **(पाद्य)** चंदन, कापूर आणि केशर यांनी युक्त असे हे मधुर जल आपल्यासाठी पाद्य म्हणून कल्पिले आहे. त्याने आपले पाय मी धूत आहे.२८.

**गन्धाब्जतुलसीबिल्व-शमीपत्राक्षतान्वितम् । साम्ब्वर्घ्यं स्वर्णपात्रेण कल्पितं दत्त गृह्यताम् ।।२९।।**

**सुस्वाद्वाचमनीयाम्बु हैमपात्रेण कल्पितम् । तुभ्यमाचम्यतां दत्त मधुपर्कं गृहाण च ।।३०।।**

**पुष्पवासितसत्तैलमंगेष्वालिप्य दत्त भोः । पंचामृतैश्च गांगाद्भिः स्नानं ते कल्पयाम्यहम् ।।३१।।**

**भक्त्या दिगंबराचान्तजलेदं दत्त कल्पितम् । काषायपरिधानं तद् गृहाणैणेयचर्म च ।।३२।।**

**नानासूत्रधरैते ते ब्रह्मसूत्रे प्रकल्पिते । गृहाण दैवतमये श्रीदत्त नवतन्तुके ।।३३।।**

गन्ध+अब्ज+तुलसी+बिल्व+शमी+पत्र+अक्षता+अन्वितं सु+अम्बु स्वर्ण+पात्रेण कल्पितं (हे) दत्त, गृह्यताम्।२९। (हे) दत्त! तुभ्यं सुस्वादु आचमनीयं अम्बु हैम+पात्रेण कल्पितम्, आचम्यताम्। मधुपर्कं च गृहाण।३०। भोः दत्त! पुष्प+वासित सत्+तैलं अङ्गेषु आलिप्य। पंचामृतैः च गाङ्ग+अद्भिः अहं ते स्नानं कल्पयामि।३१। (हे) दत्त, भक्त्या कल्पितं इदं जलं आचान्त, काषाय+परिधानं तत् ऐणेय+चर्म च गृहाण।३२। (हे) नाना+सूत्र+धर श्रीदत्त, एते ते दैवतमये नवतन्तुके प्रकल्पिते ब्रह्मसूत्रे गृहाण।३३।

**(अर्घ्य)** गंध, अक्षता, बेल-तुलसी-शमी यांच्या पानांनी तसेच कमलाने युक्त पाण्याचे अर्घ्य मी सुवर्णपात्रांत कल्पिले आहे. ते आपण ग्रहण करा.२९. **(आचमन)** सोन्याच्याच कलशांत कल्पिलेले हे मधुर जल आपल्या आचमनासाठी आणले आहे. त्यांनी आचमन करून हा मधुपर्क घ्या.३०. **(स्नान)** हे दत्ता, विविध फुलांनी सुगंधित असे हे तेल आपल्या अंगाला लावून घ्या. पंचामृताने आणि गंगोदकाने आपल्याला मनाने न्हाऊं घालत आहे.३१. **(वस्त्र)** स्नानोत्तर मी भक्तीने कल्पिलेल्या ह्या पाण्याने आचमन करून हे भगवे वस्त्र धारण करा आणि हे मृगचर्म घ्या.३२. **(यज्ञोपवीत)** नानासूत्रधारी श्रीदत्ता, दैवतमय असे नऊ तंतूंचे मी कल्पनेने केलेले यज्ञोपवीत धारण करा.३३.

**भूतिमृत्स्नासुकस्तूरी-केशरान्वितचंदनम् । रत्नाक्षताः कल्पितास्त्वामलङ्कुर्वेऽथ दत्त तैः ॥३४॥**
**सच्छमीबिल्वतुलसी-पत्रैः सौगंधिकैः सुमैः । मनसा कल्पितैर्नानाविधैर्दत्तार्चयाम्यहम् ॥३५॥**
**लाक्षासिताभ्रश्रीवास-श्रीखण्डागरुगुग्गुलैः । युक्तोऽग्नियोजितो धूपो हृदा स्वीकुरु दत्त तम् ॥३६॥**
**स्वर्णपात्रे गोघृताक्त-वर्तिप्रज्वालितं हृदा । दीपं दत्त सकर्पूरं गृहाण स्वप्रकाशक ॥३७॥**
**सषड्रसं षड्विधान्नं नैवेद्यं गव्यसंयुतम् । कल्पितं हैमपात्रे ते भुंक्ष्व दत्तांब्वदः पिब ॥३८॥**

(हे) दत्त, भूति+मृत्स्ना+सुकस्तूरी+केशर+अन्वित+चन्दनं रत्न+अक्षताः (च) त्वां कल्पिताः। अथ तैः अलङ्कुर्वे।३४। (हे) दत्त, मनसा कल्पितैः सत्+शमी+बिल्व+तुलसी+पत्रैः, नानाविधैः सौगन्धिकैः सुमैः अर्चयामि।३५। (हे) दत्त! हृदा लाक्षा+सिताभ्र+श्रीवास+श्रीखंड+अगरु+गुग्गुलैः धूपः अग्निना योजितः। तं स्वीकुरु।३६। (हे) स्वप्रकाशक दत्त, हृदा स्वर्ण+पात्रे गो+घृत+आक्त+वर्ति+प्रज्वालितं सकर्पूरं दीपं गृहाण।३७। स+षड्+रसं गव्य+संयुतं षट्+विध+अन्नं हैमपात्रे ते नैवेद्यं कल्पितम्। (हे) दत्त, भुङ्क्ष्व, अदः अम्बु पिब।३८।

**(गंधाक्षता)** हे दत्ता, भस्म, मृत्तिका, कस्तूरी, केशर यांचे बनविलेले चंदन आणि ह्या रत्नाच्या अक्षतांनी आपण अलंकृत व्हा.३४. **(पुष्प)** दत्तराज, मनानेच कल्पिलेल्या उत्तम शमी, बिल्व आणि तुलसी यांच्या पानांनी आणि नानाविध सुगंधित पुष्पांनी मी आपली पूजा करीत आहे.३५. **(धूप)** लाख, अभ्रक, श्रीवास (वृकधूप), चंदन, अगरु आणि गुग्गुळ यांच्यापासून हा मनाने केलेला धूप मी जाळीत आहे. त्याचा स्वीकार करा.३६. **(दीप)** हे स्वयंप्रकाश प्रभो, गाईच्या तुपांत भिजवलेल्या वातींनी मनानेच उजळलेला हा दीप आणि कापूर यांचा स्वीकार करा.३७. **(नैवेद्य)** भक्ष्य (घागरे, अनारसे इत्यादि), भोज्य (पायस, खीर वगैरे), लेह्य (गूळ, मध, श्रीखंड इत्यादि), चोष्य (ऊंसाच्या कांड्यासारखे), पेय (पन्हे, सार इ.) आणि चर्व्य (पापड, कुरुड्या, सांडगे इ.) असे सहा प्रकारचे, तसेच मधुर, खारट, तिखट, कडू, आंबट आणि तुरट अशा सहा रसांनी युक्त असलेले हे अन्न मी सोन्याचा ताटांत मनानेच वाढले आहे ते भक्षण करा.३८.

**प्रक्षाल्यास्यं करौ चाद्भिर्दत्ताचम्य प्रगृह्यताम् । तांबूलं दक्षिणां हैमीं कल्पितानि फलानि च ।।३९।।**
**नीराज्य रत्नदीपैस्त्वां प्रणम्य मनसा च ते । परितस्त्वत्कथोद्घातैः कुर्वे दत्त प्रदक्षिणाः ।।४०।।**
**मन्त्रवन्निहितो मूर्ध्नि दत्त ते कुसुमाञ्जलिः । कल्प्यन्ते मनसा गीत-वाद्यनृत्योपचारकाः ।।४१।।**
**प्रेर्यमाणप्रेरकेण त्वया दत्तेरितेन ते । कृतेयं मनसा पूजा श्रीमंस्तुष्टो भवानया ।।४२।।**
**दत्त मानसतल्पे मे सुखनिद्रां रहः कुरु । रम्ये व्यायतभक्त्यामतूलिकाढ्ये सुवीजिते ।।४३।।**

(हे) दत्त, आस्यं करौ च प्रक्षाल्य, आचम्य । कल्पितानि ताम्बूलं, हैमीं दक्षिणां, फलानि च प्रगृह्यताम्।३९। (हे) दत्त, त्वां मनसा रत्न+दीपैः नीराज्य, ते प्रणम्य च, त्वत् परितः त्वत्+कथा+उद्घातैः प्रदक्षिणाः कुर्वे।४०। (हे) दत्त, ते मूर्ध्नि मन्त्रवत् कुसुम+अञ्जलिः निहितः। गीत+वाद्य+नृत्य+उपचारकाः मनसा कल्प्यन्ते।४१। (हे) दत्त, मे रम्ये व्यायत+भक्ति+आम+तूलिका+आढ्ये मानस+तल्पे रहः सुख+निद्रां कुरु।४२। (हे) दत्त, प्रेर्यमाण+प्रेरकेण त्वया ईरितेन इयं पूजा मनसा कृता। (हे) श्रीमन्, अनया तुष्टः भव।४३।

**(फल-तांबूल-दक्षिणा)** भोजनोत्तर हात धुवून हे पुन्हा आचमन घ्या आणि मनाचेच विडा, सोन्याची दक्षिणा आणि फळ स्वीकारा. ३९. **(आरती-प्रदक्षिणा)** हे दत्ता, (मनाच्याच) रत्नदीपांनी तुला नीरांजन करून नमस्कार करतो आणि तुझ्या कथांचे गान करीत तुझ्याभोवती प्रदक्षिणा करतो.४०. **(मंत्रपुष्प-राजोपचार)** मंत्रघोषासहित ही पुष्पांजली आपल्या मस्तकावर वाहून गीत, वाद्य, नृत्य हे उपचारही मनानेच कल्पिले आहेत.४१. **(समर्पण)** आम्हां सर्वांना स्फूर्ती देणाऱ्या श्रीमंत दत्ता, सर्वांतर्यामि अशा तुझ्याच प्रेरणेने ही मानसपूजा केली. तिने तू प्रसन्न हो.४२. **(विसर्जन)** हे दत्तसखया, माझ्या मनोरूपी पलंगावर घातलेल्या विशाल भक्तिरूप कोमल गादीवर आपण सुखाने पहुडा. हा प्राणवायू आपल्याला विंझण करीत आहे.४३.

## क्षमापराधन

**रसज्ञावशा तारकं स्वादु लभ्यं गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४४।।**
**वियोन्यन्तरे दैवदार्ढ्याद्विभो प्राग्, गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४५।।**
**मया मातृगर्भस्थितिप्राप्तकष्टाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४६।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, रसज्ञा वशा, तारकं स्वादु लभ्यं ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४४। (हे) विभो वियोनि+अन्तरे दैव+दार्ढ्यात् प्राक् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४५। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया मातृ+गर्भ+स्थिति+प्राप्त+कष्टात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४६।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, माझी जिह्वा स्वाधीन असूनही, मी आपले सहजसुलभ, तारक आणि गोड नाम कधीच घेतले नाही. ह्या माझ्या कायिक, वाचिक आणि मानसिक अपराधांची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४४.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, पूर्वजन्मीं मानवेतर योनीत असतांना दुर्दैवाने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४५.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी मातेच्या कुशीत गर्भयातना भोगीत असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४६.

**मया जातमात्रेण संमोहितेन गृहीतं  कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४७।।**
**मया क्रीडनासक्तचित्तेन बाल्ये गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४८।।**
**मया यौवनेऽज्ञानतो भोगतोषाद् गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।४९।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया जातमात्रेण संमोहितेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४७। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया बाल्ये क्रीडन+आसक्तेन ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४८। (हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया यौवने अज्ञानतः भोग+तोषात् ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।४९।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, नवजात अवस्थेत कशाचीच शुद्ध नसल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४७.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, बालपणी खेळांतच निमग्न असल्याने आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा, क्षमा करा.४८.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, तारुण्यावस्थेत अज्ञानवश भोगासुखांतच रमून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.४९.

**मया स्थाविरेऽनिघ्नसर्वेन्द्रियेण गृहीतं कदाचिन्न ते नाम दत्त ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५०।।**
**हृषीकेश मे वाङ्मनःकायजातं हरेऽज्ञानतो ज्ञानतो विश्वसाक्षिन् ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५१।।**

(हे) क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मया स्थाविरे अनिघ्न+सर्व+इन्द्रियेण ते नाम कदाचित् न गृहीतम्। अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५०। (हे) हृषीकेश, हरे, विश्व+साक्षिन्, क्लिन्न+चित्त दत्त प्रभो, मे ज्ञानतः अज्ञानतः (कायिक) अपराधं क्षमस्व, (वाचिक) अपराधं क्षमस्व, (मानसिक) अपराधं क्षमस्व।५१।

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, म्हातारपणी माझा सर्व इंद्रियांवरचा ताबा सुटून आपले नांव मी कधीच घेतले नाही. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५०.

हे इंद्रियांच्या स्वामिन्, क्लेश हरण करणाऱ्या विश्वसाक्षी आर्द्रहृदय दत्ता, मी जाणता वा अजाणता काया, वाचा आणि मनाने केलेल्या अपराधांची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५१.

हे आर्द्रहृदय दत्तनाथा, मी ना तुझे कधी स्मरण केले, न ध्यान, न आवाहन, न पूजा! ना कधी तुझी स्तुति केली, ना गुणगान!! मी कधी तुला नमस्कारही केला नाही!!! ह्या माझ्या त्रिविध अपराधाची क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.५२.

**स्मृतो ध्यात आवाहितोऽस्यर्चितो वा न गीतः स्तुतो वन्दितो वा न जप्तः ।।**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ।।५२।।**
**दयाब्धिर्भवादृङ् न सागाश्च मादृग् भवत्याप्तमन्तोर्भवान्मे शरण्यः ।।**
**यथालम्बनं भूर्हि भूनिस्सृतांघ्रे-रिति प्रार्थितं दत्तशिष्येण सारम् ।।५३।।**

(हे) क्लिन्न+चित्त प्रभो, (त्वं) मया न स्मृतः, न ध्यातः, न अर्चितः, वा न गीतः, न स्तुतः, न वन्दितः वा न जप्तः असि। (अतः तं) अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व, अपराधं क्षमस्व।५२। भवादृक् दया+अब्धिः, मादृक् स+अगाः च न। भवति आप्त+मन्तोः मे भवान् (एव) शरण्यः, यथा भू+निःसृत+अङ्घ्रेः भूः हि आलम्बनं (अस्ति)। इति दत्त+शिष्येण सारं प्रार्थितम्।५३।

आपल्यासारखा दयासागर कोणी नाही आणि माझ्यासारखा पापी कोणी नाही! जमिनीवरून घसरून पडलेल्याला जमिनीचाच आधार असावा तसे आपलाच अपराधी असलेल्या माझा आश्रय आपणच आहांत! दत्तशिष्याने हा अभिप्राय प्रार्थनेने सादर केला.५३.

## अष्टोत्तरशतनाम.

(इथे भगवान दत्तात्रेयांची एकशे आठ अर्थगर्भ नांवे ‘द’च्या बाराखडीच्या आद्याक्षरांनी गुंफली आहेत.)

**दत्तं वन्दे दशातीतं दयाब्धिं दहनं दमम् । दक्षं दरघ्नं दस्युघ्नं दर्शं दर्पहरं दवम् ।।५४।।**
**दातारं दारुणं दांतं दास्यादं दानतोषणम् । दानं दावप्रियं दावं दासत्रं दारवर्जितम् ।।५५।।**
**दिक्पं दिवसपं दिक्स्थं दिव्ययोगं दिगम्बरम् । दिव्यं दिष्टं दिनं दिश्यं दिव्याङ्गं दितिजार्चितम् ।।५६।।**

दश+अतीतं, दया+अब्धिं, दहनं, दमं, दक्षं, दरघ्नं, दस्यु+घ्नं दर्शं, दर्प+हरं दवं दत्तं वन्दे।५४। दातारं, दारुणं, दान्तं, दास्यादं, दान+तोषणं, दानं, दाव+प्रियं दावं, दास+त्रं दार+वर्जितं (वन्दे)।५५। दिक्+पं, दिवसपं, दिक्+स्थं, दिव्य+योगं, दिक्+अम्बरं, दिव्यं, दिष्टं, दिनं, दिव्य+अङ्गं, दिति+ज+अर्चितम् वेन्दे।५६।

दशेंद्रियांच्या अतीत, दयेचे सागर, अग्निस्वरूप, दुष्टांचे (कामादि षड्रिपूंचे) दमन करणारा, भक्तरक्षणांत दक्ष, भयहारक, (भक्तांची हत्या करणाऱ्या) चोरांना मारणारा, (पितरांच्या तृप्तीसाठी) दर्शरूप (अमावास्येचे श्राद्ध), गर्वाचा नाश करणारा, *‘वन्याय च’* या श्रुतीनुसार वनस्वरूप अशा दत्ताला वंदन असो.५४. स्वतःचेही दान करणारा दानी, पापी लोकांना यमरूपाने भयावह, जितेंद्रिय, आपल्या भक्तांना विषयाच्या गुलामगिरीतून सोडविणारा, सत्पात्री दानाने संतुष्ट होणारा, सात्त्विक दानस्वरूप, वनविहारी, दावाग्निरूप, सेवकांचा पालक, पत्नीचे ग्रहण न करणारा संन्यासी (अशा दत्ताला वंदन असो.)५५. दिक्पालरूप, सूर्यस्वरूप, दिग्गजरूप, ईश्वरी योगाने युक्त, दिगंबर, देवरूप, कालात्मक, दिनरूप, दिशांमधून प्रकट होणारा, दिव्य शरीर धारण करणारा, प्रह्लादादि दैत्यांनी संपूजित (अशा दत्ताला वंदन असो.)५६.

**दीनपं दीधितिं दीप्तं दीर्घं दीपं च दीप्तगम् । दीनसेव्यं दीनबन्धुं दीक्षादं दीक्षितोत्तमम् ।।५७।।**
**दुर्ज्ञेयं दुर्ग्रहं दुर्गं दुर्गेशं दुःखभंजनम् । दुष्टघ्नं दुग्धपं दुःखं दुर्वासोऽग्र्यं दुरासदम् ।।५८।।**
**दूतं दूतप्रियं दूष्यं दूष्यत्रं दूरदर्शिपम् । दूरं दूरतमं दूर्वाभं दूराङ्गं च दूरगम् ।।५९।।**
**देवार्च्यं देवपं देवं देयज्ञं देवतोत्तमम् । देहज्ञं देहिनं देशं देशिकं देहिजीवनम् ।।६०।।**

दीन+पं, दीधितिं, दीप्तं, दीर्घं, दीपं च दीप्त+गुं, दीन+सेव्यं, दीन+बन्धुं, दीक्षा+दं, दीक्षित+उत्तमं (वन्दे)।५७। दुः+ज्ञेयं, दुः+ग्रहं, दुः+गं, दुर्गा+ईशं, (दुर्ग+ईशं), दुःख+भञ्जनं, दुष्ट+घ्नं दुर्वासः+अग्र्यं, दुः+आसदं (वन्दे)।५८। दूतं, दूत+प्रियं, दूष्यं, दूष्य+त्रं, दूर+दर्शि+पं, दूरं, दूरतमं, दूर्वा+आभं, दूर+अङ्गं च दूर+गं (वन्दे)।५९। देव+अर्च्यं, देव+पं, देवं, देय+ज्ञं, देवता+उत्तमं, देह+ज्ञं, देहिनं, देशिकं, देहि+जीवनं (वन्दे)।६०।

दीननाथ, किरणरूप, तेजस्वी, देदीप्यमान दृष्टीचा, दीनांना सेव्य, दीनबंधू, दीक्षादाता, दीक्षितांमध्ये श्रेष्ठ (अशा दत्ताला वंदन असो).५७. *'गुहाहितं गह्वरेष्ठं'* या श्रुतीनुसार जाणण्यास कठीण, (मन, वाचा आणि इंद्रियें यांना) अप्राप्य, उमापति शिवस्वरूप किंवा मानवी शरीररूप दुर्गाचे रक्षण करणारा, दुःखभंजक, दुष्टसंहारक, (वांझ महिषी दुभती करून तिचे) दूध पिणारा, (स्वकर्मार्जित) दुःखस्वरूप, दुर्वासमुनींचा ज्येष्ठ भ्राता आणि दुष्प्राप्य (अशा दत्ताला वंदन असो).५८. (अग्निरूपाने देवांचा) दूत, (हनुमान, उद्धव आदि आपल्या) दूतांना प्रिय असणारा, वाळवंटांत राहुटीसारखा आश्रयभूत, पतितपावन, दूरदर्शी विद्वानांचा ईश्वर, इंद्रियांपासून दूर असलेला, बहिर्मुख जीवांना कोटिकल्पांतही अलभ्य, दूर्वांकुराप्रमाणे तेजस्वी, त्रैलोक्यव्यापी अशा विशाल देहाचा आणि दोन पायांत ब्रह्मांड ओलांडणारा (अशा दत्ताला वंदन असो).५९. देवांना पूज्य, देवांचा पालक, देवांचा देव, सर्वश्रेष्ठ दैवत, देहरूपी क्षेत्राचा ज्ञाता (क्षेत्रज्ञ), स्वमायेने लीलादेह धारण करणारा, शास्त्राज्ञास्वरूप, मार्गदर्शक गुरू, देहधाऱ्यांना जीवनस्वरूप (अशा दत्ताला वंदन असो).६०.

**दैन्यं दैन्यहरं दैवं दैन्यदं दैविकांतकम् । दैत्यघ्नं दैवतं दैर्घ्यं दैवज्ञं दैहिकार्तिदम् ।।६१।।**
**दोषघ्नं दोषदं दोषं दोषित्रं दोर्द्वयान्वितम् । दोषज्ञं दोहपं दोषेड्बन्धुं दोर्ज्ञं च दोहदम् ।।६२।।**
**दौरात्म्यघ्नं दौर्मनस्य-हरं दौर्भाग्यमोचनम् । दौष्ट्यत्रं दौष्कुल्यदोष-हरं दौर्हृद्यभञ्जनम् ।।६३।।**

दैन्यं, दैन्य+हरं, दैवं, दैन्य+दं, दैविक+अन्तकं, दैत्य+घ्नं, दैवतं, दैर्घ्यं, दैव+ज्ञं, दैहिक+आर्तिदं (वन्दे)।६१। दोष+घ्नं, दोष+दं, दोषं, दोषि+त्रं, दोः+द्वय+अन्वितं, दोष+ज्ञं, दोह+पं, दोषेड्+बन्धुं, दोः+ज्ञं, च दोहदं (वन्दे)।६२। दौरात्म्य+घ्नं, दौर्मनस्य+हरं, दौर्भाग्य+मोचनं, दौष्ट्य+त्रं, दौष्कुल्य+दोष+हरं, दौर्हृद्य+भञ्जनं (वन्दे)।६३।

दुष्कर्मकर्त्यांना दैन्यस्वरूप, भक्तांचे दैन्य हरण करणारा, कृतकर्मांचा फलस्वरूप, भाग्यहीनांना दैन्य देणारा, आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक तापांचे शमन करणारा, विष्णुरूपाने दैत्यांचा संहारक, दैवतस्वरूप, साक्षात महानता, ज्योतिषज्ञ, देहदुःख नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६१. भक्तांचा उद्धार करण्यासाठी त्यांचे चित्तदोष घालविणारा, पापी लोकांची मने दोषांनी युक्त करणारा तसेच त्यांच्या कर्मानुसार कफादि दोषस्वरूप, शरण आलेल्या अपराध्यांचा त्राता, द्विभुज (चतुर्भुज आणि षड्भुजही), सर्व जीवांचे दोष जाणणारा, (वंध्या महिषीचे) दोहन करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीचा पालक, चंद्राचा भाऊ, कोट्यवधी भुजांचा ज्ञाता, (व्रजांतील) गाईंचे दोहन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६२. दुःस्वभाव नाहीसा करणारा, मनाचे विकार दूर करणारा, दुर्भाग्याचे निवारण करणारा, (मनाच्या) दुष्टपणापासून रक्षण करणारा, कुलहीनत्वाचा दोष घालविणारा, हृदयाचे काठिण्य नष्ट करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६३.

**दण्डज्ञं दण्डिनं दण्डं दम्भघ्नं दम्भिशासनम् । दन्त्यास्यं दन्तुरं दंशि-घ्नं दण्ड्यज्ञं च दण्डदम् ।।६४।।**
**अनन्तानन्तनामानि सन्ति तेऽनन्तविक्रम । वेदोऽपि चकितो यत्र नुर्वाग्हृद्दूर का कथा ।।६५।।**
**नामरूपगुणातीत भेदसङ्गविवर्जित । एक एवाद्वितीयोऽसि परमात्मन् हि नाकवत् ।।६६।।**

दण्ड+ज्ञं, दण्डिनं, दण्डं, दम्भ+घ्नं, दम्भि+शासिनं, दन्त्य+आस्यं, दन्तुरं, दंशि+घ्नं, दण्ड्य+ज्ञं च दण्ड+दं (वन्दे)।६४। (हे) अनन्त, अनन्त+विक्रम, ते अनन्त+नामानि सन्ति। यत्र वेदः अपि चकितः, (हे) वाक्+हृत्+दूर, नुः का कथा?।६५। (हे) नाम+रूप+गुण+अतीत, (हे) भेद+सङ्ग+विवर्जित, परमात्मन्, नाकवत् एक एव अद्वितीयः असि।६६।

दण्डनीतिज्ञ, दण्डधारी संन्यासी, अपराध्यांना दण्डस्वरूप, दंभहारक, दंभी माणसाला शासन करणारा, गजमुख अर्थात् गणेशस्वरूप, करालदंष्ट्र, मधमाशी इत्यादींची पीडा निवारणारा, शासनार्ह अपराध्यांना ओळखणारा तसेच त्यांना शासन करणारा (अशा दत्ताला वंदन असो).६४. हे अनंता, तुझे अगणित विक्रम असल्याने तुझी नावेही अनंत आहेत. वाणी आणि मनाला अगोचर असणाऱ्या देवा, वेदही जिथे चकित होतात तिथे मानवांची काय कथा?६५. नाम, रूप, गुण या सर्वांच्या पलीकडे असणाऱ्या, स्वगत, सजातीय आणि विजातीय भेद आणि मायासंग यांच्या वेगळा आकाशासारखा एकमेवाद्वितीय असा तू परमात्मा आहेस.६६.

**नामरूपगुणाभेदा मायासक्तिरनेकता । कल्पिता स्थूलधीभिस्ते महाकाशादिवद्विभो ।।६७।।**
**बहुरूपाप्रमेया ते मायैषा जगदीश्वर । मन्यते मेऽहमित्यस्या रममाणो गुणेष्वसौ ।।६८।।**
**कारणं त्विदमेवात्र जगद्विपरिवर्तने । येषां नाव्यक्त गम्योऽसि त्वमेव परमा गतिः ।।६९।।**

(हे) विभो! स्थूल+धीभिः ते नाम+रूप+गुणा भेदा मायासक्तिः अनेकता महा+आकाशवत् कल्पिता।६७। (हे) जगत्+ईश्वर, एषा बहुरूपा अप्रमेया ते माया। अस्या रममाणो असौ, अहं, मे इति मन्यते।६८। इदं एव अत्र जगत्+विपरिवर्तने कारणम्। (हे) अव्यक्त येषां त्वं एव परमा गतिः (इति) न गम्यः असि।६९।

नाम, रूप, गुण, भेद आणि मायेची आसक्ती हे सर्व स्थूलबुद्धीच्या (सगुणनिष्ठ) लोकांनी तुझ्या ठायीं कल्पिलेले आहेत. जसे एका महाकाशाचे ठायी जलाकाश, घटाकाश अशी नावे देऊन त्या त्या उपाधीच्या अनुषंगाने त्या त्या रूपाची, आकाराची कल्पना केली जाते. ही कल्पनाही तात्त्विक नसून अज्ञानमूलक कल्पनेचाच खेळ आहे. त्याचप्रमाणे किंवा ज्ञानी पुरुषांनी शुद्ध स्वरूप जाणण्यासाठी विकल्प किंवा त्याचा अभाव या दोन्हींनी अस्पृष्ट आत्मवस्तूला जाणण्यासाठी चंद्रशाखान्यायाने कल्पिलेल्या आहेत (पंचशील १:५२). हे जगदीश्वर, अंश आणि गुण यांच्या वैविध्याने नानारूपांनी नटलेली ही तुझी माया, कोणत्याही प्रमाणांनी जाणतां येत नाही; तिच्या कार्यावरून तिचे अनुमान करतां आले तरी ही खरी आहे की खोटी असा निश्चय करतां येत नाही. म्हणजेच ती अनिर्वचनीय आहे. ह्या मायेच्या गुणांत देहादिकांच्या अध्यासाने भुलून पुरुष  मी आणि माझे ह्या मोहांत पडतो.६७-६८.  हेच अहंकार आणि ममता जगाच्या सतत उलाढालीचे कारण आहे. पण हे अव्यक्ता, तूच त्यांची अंतिम गति आहेस हे ते जाणत नाहीत.६९.

**आसत्यलोका लोकास्ते पुनरावर्तिनोऽक्षर । तस्मात्त एव धन्याः स्युर्गृहीतं धाम यैस्तु ते ।।७०।।**
**नानुमानेन ते धाम ग्रहीतुं शक्यते ह्यतः । मृग्योऽसि पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः ।।७१।।**

(हे) अक्षर! ते आसत्यलोकाः लोकाः पुनः+आवर्तिनः। तस्मात् यैः ते धाम गृहीतं ते एव धन्याः स्युः।७०। ते धाम अनुमानेन ग्रहीतुं न शक्यते। अतः पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः असि।७१।

**ब्रह्मलोकाचे दोन प्रकारः-** परमश्रेष्ठ सत्य(ब्रह्म)लोकापर्यंतच्या, सर्वही लोकांपासून (मनुष्यदेहांत) परतावे लागते. (शंका) 'सत्यलोकाला जाणाऱ्या ब्रह्मज्ञाच्या स्वागतासाठी हातांत चामर, माला, अंजन, वस्त्र आणि फळे घेऊन शंभर शंभर अशा पांचशे अप्सरा धांवतात, त्याला ब्रह्मालंकाराने भूषवितात; असा ब्रह्मालंकृत ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप होतो. स्वाराज्य प्राप्त होऊन तो जीव ब्रह्मदेवाबरोबर कल्पांतीं मुक्त होतो' असे श्रुति आणि स्मृतींत वर्णन आहे. ब्रह्मसूत्रांतही (४-२-१०) ह्याची पुष्टी केलेली आहे. काठकश्रुतीतही (२-३-५) ब्रह्मलोकांत ऊनसावलीप्रमाणे ब्रह्मत्वाची स्पष्ट प्रतीति होते असे म्हटले आहे. मग अशा ब्रह्मलोकापासून पुन्हा भूलोकाला यावे लागते असे कसे म्हटले? या शंकेचे समाधान सांगतात. ब्रह्मलोक दोन प्रकारचा आहे. एक क्रममुक्तीच्या साधकांना मिळणारा आणि दुसरा पुण्यकर्माने मिळणारा. यांतील जे पुण्याईच्या बळावर ब्रह्मलोकांत जातात त्यांना त्यांच्या पुण्याचा उपभोग झाल्यावर पुनर्जन्म प्राप्त होतो; कारण त्यांनी ज्ञानाचे साधन केलेले नसते. ज्ञानप्राप्तीचा साधक मात्र ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतो असा अभिप्राय. अशा रीतीने ज्यांनी तुझे रूप आत्मभावाने ग्रहण केले, जे तुझ्याशी एकरूप झाले ते खरोखर धन्य होत.७०. ते तुझे स्वरूप तर्काने जाणतां येत नाही. (कारण अनुमानाने केवळ 'त्वं'पदाचा अर्थ कळूं शकतो.) त्यामुळे बुद्ध्यादिकांच्या साह्याने जागरूक राहणारा मानवच तुझा शोध घेऊं शकतो.७१.

**पुंस्त्वेऽप्यर्क इवान्धानां गोकल्पानामतीन्द्रिय । स्वप्नेऽपि नैव ते वार्ता पुनः प्रत्यक्षता कुतः ।।७२।।**
**प्रेष्ठत्वद्भक्तसंयोग-विवेकामलदृष्टिभिः । साङ्ख्ययोगपरैर्धीरैः क्रमात्ते धाम गम्यते ।।७३।।**
**तस्माद्दत्तं नृजन्मेदं त्वया दिष्ट्याऽमृतक्षमम् । सद्दृष्टिदानाद्भगवंस्तत्साफल्यं कुरु प्रभो ।।७४।।**
**त्वत्प्रेमभक्त्यैव सदा मदात्मा धिया धियं दृष्टिमपीश दृष्ट्या ।**
**अंगैः सदाङ्गानि दृढं दयाब्धे हरे निबध्नात्विति मेस्ति याच्ञा ।।७५।।**

(हे) अति+इन्द्रिय, पुंस्त्वे अपि गो+कल्पानां, अन्धानां अर्क इव, स्वप्ने अपि ते वार्ता न एव। पुनः प्रत्यक्षता कुतः?७२। प्रेष्ठ+त्वत्+भक्त+संयोग+विवेक+अमल+दृष्टिभिः साङ्ख्य+योग+परैः ते धाम क्रमात् गम्यते।७३। (हे) भगवन् इदं अमृत+क्षमं नृ+जन्म त्वया दिष्ट्या दत्तम्। (हे) प्रभो, सत्+दृष्टि+दानात् तत्+साफल्यं कुरु।७४। (हे) हरे, मत्+आत्मा त्वत्+प्रेम+भक्त्या एव, (मे) धियं (त्वत्) धिया, दृष्टिं अपि दृष्ट्या, अङ्गानि अङ्गैः सदा दृढं निबध्ना अस्तु इति याच्+ञा।७५।

हे इंद्रियातीत प्रभो, मानवांतसुद्धां जे पशुतुल्य आहेत त्यांना तुझी स्वप्नांतही वार्ता नसते; मग प्रत्यक्ष अनुभूतीची काय गोष्ट? साकार ब्रह्मनिष्ठाही दुर्लभ आहे मग मोक्षाची काय वार्ता असा भाव. कारण मोक्ष केवळ ज्ञानानेच प्राप्त होतो; त्याला दुसरा मार्गच नाही असे श्रुति (महावाक्योपनिषद् ३; श्वेताश्वतर उ. ३-८) म्हणते.७२. तुझ्या प्रियतम भक्तांचा सत्संग आणि विवेक ह्या दोन निर्मल डोळ्यांच्या साह्याने ज्ञानयोग आणि निष्कामकर्मयोग यांचे अनुष्ठान यमनियमादि साधनांसह करणाऱ्याना श्रवण-मनन-निदिध्यासनादि क्रमाने तुझे स्वरूप प्राप्त होते.७३. त्यासाठी हे भगवंता, दत्तप्रभो, आपण आमच्या भाग्याने हा मोक्षयोग्य मानवजन्म दिलेला आहे त्याचे साफल्य होण्यासाठी (वरीलप्रमाणे) निर्मल नेत्रांचे दान आपण करा.७४. हे हरे, तुझ्या प्रेमभक्तीने माझे मन, तुझ्या बुद्धीने माझी बुद्धी, दृष्टीने दृष्टी तसेच तुझ्या सर्व अंगांनी माझी अंगे सदैव निबद्ध असोत. तुझा आणि माझा परस्परवियोग अंशतःसु--दोर कधीच होऊं नये.७५.

**पादौ त्वदीयालयतीर्थयात्राविहारिणावर्चनतत्परौ मे ।**
**करौ रसज्ञापि भवत्वजस्रं सत्त्वत्कथोद्घातरसज्ञतोत्का ।।७६।।**
**त्वत्पादपद्मच्युतपुष्पगन्धं नासा भजत्वक्षियुगं गुणात्मन् ।**
**त्वन्मूर्तिमासेचनकां श्रुती मे श्राव्यास्त्वदीया भगवन्कथाश्च ।।७७।।**
**त्वदीयभक्ताङ्घ्रिमलाब्जपूतां धूलिं मदङ्गानि सदा वहन्तु ।**
**मनस्तुरङ्गो निवसत्वजस्रं त्वय्येव दीपोऽङ्ग यथा निवाते ।।७८।।**

मे पादौ त्वदीय आलय+तीर्थ+विहारिणौ, मे करौ अर्चन+तत्परौ, रसज्ञा अपि अजस्रं सत्+त्वत्+कथ+उद्घात+रसज्ञता+उत्का भवतु।७६। नासा त्वत्+पाद+पद्म+च्युत+पुष्प+गन्धं भजतु। (हे) गुण+आत्मन्, (मे) अक्षि+युगं आसेचनकां त्वत्+मूर्तिं भजतु।७७। (हे) भगवन्, मे श्रुतीः च त्वदीया श्राव्या कथाः (भजन्तुर)। मत्+अङ्गानि सदा त्वदीय+भक्त+अङ्घ्रि+अमल+अब्ज+पूतां धूलिं वहन्तु। तुरङ्गः मनः, यथा निवाते दीपः, अजस्रं त्वयि एव निवसतु।७८।

ह्या माझ्या शरीराचा विनियोग सर्वतोपरी तुझ्या सेवेतच व्हावा यासाठी प्रार्थना करतात. माझे मन तुझ्याच प्रेमभक्तीशी, बुद्धी तुझ्या बुद्धीशी, दृष्टी दृष्टीशी, सर्व अंगे तुझ्या अंगांशी सतत घट्ट जडलेले राहोत.७५. माझे पाय तुझ्याच मंदिरांच्या व तीर्थांच्या यात्रांत विचरण करोत. माझे हात तुझ्या पूजनांत तत्पर होवोत. माझी जिह्वा तुझ्या सत्कथांच्या गीतांचा स्वाद जाणून त्यांच्या उद्घोषासाठी सदैव आतुर असो.७६. माझे नाक तुझ्या पायांवरून पडलेल्या फुलांचा गंध सेवन करो. जिला पाहून मन कधी भरतच नाही अशी तुझी मनोहर मूर्ति सतत माझ्या दृष्टीसमोर राहो.७७. तुझ्या भक्तांच्या पदकमलांनी पवित्र झालेल्या धुळीने माझे शरीर सदैव माखलेले असो. सतत धांवणारा हा मनरूपी घोडा तुझ्या ठायी निवातींच्या दीपाप्रमाणे स्थिर राहो. वाऱ्याची झुळकही जेथे येत नाही अशा ठिकाणी दिव्याची ज्योत जशी निश्चळ राहते तसे संकल्पापासून निपजणाऱ्या सर्व कामांचा त्याग करून, अभ्यास आणि वैराग्य यांच्या बळाने हळू हळू उपरमलेले माझे चित्त तुझ्या ठायी स्थिर होवो. म्हणजेच धर्ममेघ नांवाच्या निर्बीज समाधीची सिद्धि होवो ही प्रार्थना.७८.

**शिरो नमत्वीश्वर तेऽङ्घ्रिपद्मं देहः सदाऽऽलिङ्गयतु त्वदर्चाम् ।**
**एषा त्वदीयैव तनुस्त्वमेव संबन्धिनो मे नहि केऽद्वितीय ।।७९।।**
**नूनं भवानृषिर्नैव न वर्णाश्रमलिङ्गभाक् । निर्मितं भवतैवेदं विश्वं स्वांशांशतोऽखिलम् ।।८०।।**
**न जानन्ति भवन्माया-मोहिता दिव्यमुत्तमम् । भवद्धामात एवैते भ्रमन्त्यसुरभावगाः ।।८१।।**

(हे) ईश्वर, शिरः ते अङ्घ्रि+पद्मं नमतु। देहः सदा त्वत्+अर्चां आलिङ्गयतु। एषा तनुः त्वदीय एव। (हे) अद्वितीय, त्वं एव मे सम्बन्धिनः, न हि के (अपि त्वत्तः अन्याः)।७९। भवान् ऋषिः न एव, न वर्ण+आश्रम+लिङ्ग+भाक्। भवता एव इदं अखिलं विश्वं स्व+अंशतः निर्मितम्।८०। भवत्+माया+मोहिताः दिव्यं उत्तमं भवत्+धाम न जानन्ति। अत एव ते असुर+भाव+गाः भ्रमन्ति।८१।

ईश्वरा, माझे मस्तक तुझ्याच चरणीं नत असो, माझा देह सतत तुझ्या मूर्तीच्या आलिंगनांत राहो. ही माझी तनु तुझीच आहे. अद्वितीया, तुझ्यावांचून कोणीही माझे नाही.७९. आपण म्हणाल की माझी एका ऋषिपुत्राची का एवढी आळवणी करतोस?' तर खरोखर आपण ऋषिपुत्र नाहीत. तसेच आपल्याला वर्ण, आश्रम, लिंग आदींचा कांही संबंध नाही. वर्णाश्रमादि देहाच्या ठिकाणी मायेने कल्पिलेले आहेत. आपण आत्मस्वरूप आहां. *'असंगो न हि सज्जते'* (बृहदारण्यक उपनिषद् ४-५-१५) ह्या श्रुतीनुसार त्याचा देहादि उपाधीशी कांही संबंध नाही. कूटस्थ प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार झालेलाही वर्णाश्रमलिंगाच्या पलीकडे जातो. आपण तर लीलेने देह धरला आहे. मग आपण वर्णाश्रमादींच्या अतीत आहे हे काय सांगायला हवे? आपणच ह्या नामरूपात्मक विश्वाचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहां आणि ब्रह्मदेवांच्या करवी आपणच हे जगत् रचले आहे.८०. आपल्या मायेने मोहून जाऊन असुरभावापन्न झालेले आपले उत्तम आणि दिव्य स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळेच ते संसारचक्रांत भ्रमण करतात.८१.

**कर्ता भर्तासि हर्ता त्वं प्रत्यक्षं तत्त्वमस्यपि । भो सर्वं खल्विदं ब्रह्म त्वमस्यात्मासि केवलम् ।।८२।।**
**त्वदुदेति रमत्येतद्विश्वं त्वय्येव लीयते । अष्टमूर्तिभिराभिस्त्वमाभासीव जगन्मयः ।।८३।।**
**दिक्पाला लोकपालाश्च श्रूयते दृश्यतेऽखिलम् । चराचरं जगल्लोका विष्णो तेऽवयवा अमी ।।८४।।**
**निगूढतत्त्व ते ज्ञातं यत्किञ्चिल्लोकदुर्ग्रहम् । चेष्टितं ते प्रसादोऽयं प्राक्पुण्यैर्मय्युपस्थितः ।।८५।।**

त्वं कर्ता, भर्ता, हर्ता, प्रत्यक्षं तत्त्वं अपि असि। भो त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म, केवलं आत्मा असि।८२। एतत् विश्वं त्वत् उदेति, रमति, त्वयि एव लीयते। त्वं अष्ट+मूर्तिभिः जगत्+मयः इव आभासि। (हे) विष्णो, दिक्+पालाः लोक+पालाः च अखिलं चर+अचरं जगत् (यत्) श्रूयते, दृश्यते, अमी ते अवयवयाः।८४। (हे) निगूढ+तत्त्व, ते लोक+दुः+ग्रहं चेष्टितं यत् किञ्चित् ज्ञातं अयं ते प्रसादः मयि प्राक्+पुण्यैः उपस्थितः।८५।

सगुणरूपाने तूच या सृष्टीचा कर्ता, पोशिंदा आणि संहर्ता आहेस. तूच प्रत्यक्ष तत्त्वस्वरूप आहेस. हे सर्व जग तूच आहेस; तुझ्याच अधिष्ठानावर ते भासत आहे. तूच परब्रह्म आहेस. हा श्लोक मंत्रगर्भ आहे.८२. *'यतो वा इमानि भूतानि...'* ह्या श्रुतिवचनानुसार (तैत्तिरीय उपनिषद् ३-१) हे सर्व जगत् तुझ्यापासून उदय पावते, तुझ्यांतच रमते आणि तुझ्यांतच विलीन होते. पृथ्वी, आप, अग्नि, सूर्य, चंद्र, वायु, आकाश आणि जीवात्मा ह्या अष्टमूर्तींच्या रूपाने भासणारा विश्वात्मक तूच आहेस (*'इव'* शब्दाने ते तत्त्वतः तसे नाही हे सूचित केले आहे.).८३. इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मदेवादि लोकपाल, सर्व चराचर जगत्, हे अनुभवाला येणारे जगत्, वेदांनी वर्णिलेले स्वर्गादि सप्तलोक, सप्तपाताल हे सर्व, हे विष्णो, तुझेच अवयव आहेत. कारण तूच विराट स्वरूपाने हे सर्व धारण करतोस.८४. हे निगूढतत्त्व (अविज्ञेयस्वरूप), लोकांना दुर्बोध असणाऱ्या तुझ्या लीला किंचित् मात्र मला समजल्या हा तुझाच प्रसाद होय.८५.

**सुखमैन्द्रियकं क्वापि न कांक्षे ते पदाश्रितः । नाकादीन्न प्रशंसामि नैव निन्दामि नारकान् ।।८६।।**

**यथेच्छं क्वापि मां कर्म-योगात्स्थापय विश्वभृत् । मां यत्र क्वापि ते भक्तिर्न जहात्विति काङ्क्षितम ।।८७।।**

**स्तुवन्तु निन्दत्वपि ताडयन्तु मां पूजयन्त्वत्र जना न वापि ।**

**देहः पतत्वद्य युगान्तरे वा न किञ्चिदिष्टं न च मेऽप्यनिष्टम् ।।८८।।**

**हृद्ध्यात्मेन्द्रियवाक्कायैः सदा प्रकृतिभावतः । यद्यत्करोम्यर्पयामि परात्मन्दत्त सर्व ते ।।८९।।**

ते पद+आश्रितः क्व अपि ऐन्द्रियकं सुखं न काङ्क्षे। नाकादीन् न प्रशंसामि, न एव नारकान् निन्दयामि।८६। (हे) विश्वभृत्, मां कर्म+योगात् यथा+इच्छं क्व अपि स्थापय, यत्र क्व अपि ते भक्तिः न जहातु इति काङ्क्षितम्।८७। जनाः मां स्तुवन्तु, निन्दन्तु, अपि वा ताडयन्तु, न वा पूजयन्तु; देहः अद्य, युग+अन्तरे वा पततु; मे न किञ्चित् इष्टं न च अपि अनिष्टम्।८८। (हे) पर+आत्मन् दत्त, हृत्+धी+आत्म+इन्द्रिय+वाक्+कायैः सदा प्रकृति+भावतः यत् यत् करोमि, सर्वं ते अर्पयामि।८९।

आपल्या पदांचा आश्रय लाभल्यावर आतां मी कसल्याही ऐंद्रिय (भौतिक) सुखाची इच्छा करीत नाही. मी न स्वर्गादिकांना नावाजतो न नरकांची निंदा करतो.८६. हे जगाच्या पोषका, कर्मयोगानुसार (माझ्या कर्मगतीनुसार) मला जिथे कुठे ठेवायचे ते ठेव. तुझ्या भक्तीला मात्र मी कधी पारखा होऊ नये हीच माझी प्रार्थना आहे.८७. लोक माझी स्तुति करोत की निंदा; माझी पूजा करोत की मला चोप देवोत; हा देह आजच पडो वा युगानंतर! मला कांही इष्ट नाही की अनिष्ट नाही.८८. हे दत्त परमात्मन्, मनाने, बुद्धीने, शरीराने वा स्वाभाविक प्रकृतीने मी जे जे करतो ते सर्व तुला अर्पण असो. मन, बुद्धी, अहंकार, दहा इंद्रिये, वाचा (विशिष्ट वाचिक कर्माच्या निर्देशासाठी वेगळा उल्लेख) आणि काया तसेच स्वभावतः जी लौकिकादि कर्मे मी करतो ती सर्व हे दत्ता, तुला समर्पण करतो.८९.

**लीलात्मना योऽत्रिगृहेवतीर्णो दत्ताख्य उन्मत्तपिशाचवद्यः ।**
**बालो युवा क्वापि जरन्जटाभृत् क्वचिदृषिर्व्यक्तपरीक्षितश्च ।।९०।।**
**त्यागी सुभोगी क्वचिदस्ति संगी योगी सुवासाः क्वचिदस्ति नग्नः ।**
**तुष्टः कृशः पुष्ट इह क्वचिद्यो दंडी च भिक्षुः क्वचिदस्ति वर्णी ।।९१।।**
**गृही वनी वर्णविरुद्धचेष्टः क्वचिच्च वर्णाश्रमधर्मयुक्तः ।**
**इत्यादयो यस्य विचित्रचेष्टा देवर्षिहृद्वागयनं व्यतीताः ।।९२।।**

यः दत्त+आख्यः लीला+आत्मनः अत्रि+गृहे अवतीर्णः, यः उन्मत्त+पिशाचवत्, बालः, युवा, क्व अपि जटा+भृत् जरन्, क्वचित् व्यक्त+परीक्षितः ऋषिः, त्यागी, सुभोगी, क्वचित् संगी अस्ति, (क्वचित्) सुवासाः क्वचित् नग्नः अस्ति; यः इह क्वचित् तुष्टः, कृशः, पुष्टः; क्वचित् दंडी भिक्षुः (क्वचित्) वर्णी अस्ति।९१। क्वचित् गृही, (क्वचित्) वर्णी, वर्ण+विरुद्ध+चेष्टः क्वचित् च वर्ण+आश्रम+धर्म+युक्तः। यस्य इत्यादयः विचित्र+चेष्टाः देव+ऋषि+हृत्+वाक्+अयनं व्यतीताः।९२।

जो अत्रींच्या घरांत लीलादेह धारण करून अवतरला; (जो) भक्तांची परीक्षा पाहण्यासाठी (ज्ञान व ऐश्वर्य यांनी संपन्न असूनही) बाल, उन्मत्त आणि पिशाचवत् वर्तन करतो; कधी बाल, कधी युवा, कधी जटाधारी वृद्ध तर कधी लोकांनी प्रकट पाहिलेला ऋषि; कधी योगी, कधी उत्तम वेषांत तर कधी नग्न; कधी तुष्ट, कधी पुष्ट तर कधी कृश; कधी दंडधारी संन्यासी, कधी भिक्षु (दंडरहित परमहंस), कधी ब्रह्मचारी, कधी गृहस्थ, कधी वानप्रस्थ, कधी वर्णाश्रमांच्या विरुद्ध वागणारा तर कधी परत वर्णाश्रमांना धारण करणारा; इत्यादि ज्याच्या अनेक प्रकारच्या अदभुत लीला देव आणि ऋषींच्यासुद्धां मन आणि वाचा यांना न आकळणाऱ्या आहेत (मानवांचा काय पाड?).९०-९२.

**यो भक्तरक्षाक्षण एव यस्य वै सेवा स्मृतिर्भोज्यनिवेदनं धिया ।**
**पूजाफलं योऽर्पयतीह दुर्लभं भक्तस्मृतौ संनिधिकृत्क्षणे क्षणे ॥९३॥**
**यस्यास्ति माहुरे निद्रा निवासः सह्यपर्वते । भागीरथ्यां सदा स्नानं ध्यानं गन्धर्वपत्तने ॥९४॥**
**कुरुक्षेत्रे चाचमनं धूतपापेश्वरे तथा । विभूतिधारणं संध्या करहाटे श्रियः पुरे ॥९५॥**
**भिक्षा विठ्ठलपुर्यस्य सुगन्धिद्रव्यधारणम् । भुक्तिः सारपुरे सायं-संध्या पश्चिमसागरे ॥९६॥**

यः भक्त+रक्ष+क्षणः, यस्य वै स्मृतिः एव सेवा, धिया भोज्य+निवेदनं पूजा, यः इह दुर्लभं फलं अर्पयति, भक्त+स्मृतौ संनिधि क्षणे क्षणे संनिधि+कृत्।९३। यस्य निद्रा माहुरे अस्ति, निवासः सह्य+पर्वते, सदा भागीरथ्यां स्नानं, गन्धर्व+पत्तने ध्यानं, कुरुक्षेत्रे च आचमनं, तथा धूतपापेश्वरे विभूतिधारणं, करहाटे संध्या, श्रियः पुरे भिक्षा, अस्य विठ्ठलपुरि सुगन्धि+द्रव्य+धारणं, सारपुरे भुक्तिः, पश्चिम+सागरे सायं+संध्या (अस्ति)।९४-९६।

आपल्या भक्तांचे रक्षण करणे हाच ज्याचा आनंदोत्सव आहे, केवळ स्मरण हीच ज्याची सेवा आहे, आपले अन्न (स्वतः सेवन करण्याआधी) त्याला भक्तीने समर्पण करणे हीच ज्याची पूजा आहे आणि अशा अर्चकांच्या भक्तीने प्रसन्न होऊन जो तपादिकांनीही दुर्लभ असे फळ देतो. भक्तांनी स्मरतांच त्यांच्या निकट उभा राहणारा (तो दत्त परमात्मा).९३.

**दत्तात्रेयांची दिनचर्या.**

जो माहूरगडावर झोंपतो, सह्यशिखरावर राहतो, गंगाभागीरथींत नित्य स्नान करतो, गाणगापुरीं ध्यान करतो, कुरुक्षेत्रांत आचमन करतो, (हिमालयाच्या पायथ्याशी) धूतपापेश्वरला भस्म धारण करतो, कऱ्हाडला संध्या करतो, कोल्हापुरामध्ये भिक्षा करतो, पंढरपुरामध्ये सुगंधि द्रव्य धारण करतो, पांचालेश्वरीं भोजन करतो आणि पश्चिमसागराच्या तटावर सायंसंध्या करतो.९४-९६.

**स एष भगवान्दत्तः सदा वसतु मे हृदि । हृद्धीन्द्रियादिव्यापारे सदा तत्स्मृतिरस्तु मे ।।९७।।**
**पादादि मूर्धपर्यन्तमेतद्वै भौतिकं वपुः । परिरक्षतु विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः ।।९८।।**
**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यदृग्योपि शृणोत्यकर्णः ।**
**यो वेत्ति वेद्यं न हि यस्य वेत्ता सोऽग्र्यः प्रधानः पुरुषो हि दत्तः ।।९९।।**

सः एषः भगवान् दत्तः सदा मे हृदि वसतु। हृत्+धी+इन्द्रियादि+व्यापारे सदा मे तत् स्मृतिः अस्तु।९७। एतत् पादादि मूर्धपर्यन्तं भौतिकं वपुः विश्वात्मा सदा सर्वत्र सर्वतः वै परिरक्षतु।९८। यः अ+पाणि+पादः ग्रहीता जवनः, अदृक् अपि पश्यति, अकर्णः शृणोति। यः वेद्यं वेत्ति। यस्य वेत्ता न हि। सः अग्र्यः प्रधानः पुरुषः दत्तः हि।९९।

तो हा भगवान् दत्त सदैव माझ्या अंतःकरणांत राहो, माझ्या मन, बुद्धी, इंद्रियें आणि देहाच्या सर्व क्रियांत मला त्याचे स्मरण राहो.९७. **कवच** - पायापासून मस्तकापर्यंत ह्या पांचभौतिक स्थूल आणि सूक्ष्म शरीराचे तो विश्वात्मक भगवंत सदा सर्व दिशांनी संरक्षण करो.९८. ज्याच्या सत्तेने थोटासुद्धां (देतो) घेतो, पांगळाही वेगाने धांवतो, आंधळा पाहतो, बहिरा ऐकतो; जाणण्यायोग्य सर्वांचा जो ज्ञाता आहे, पण त्याचा ज्ञाता कोणीही नाही (श्वेताश्वतर उपनिषद् ३:१९). कारण तो जाणीवेच्या पलीकडे आहे. तोही स्वतःला 'मी असा आहे', असे जाणत नाही. ह्यावर कुणी असे म्हणेल की मग तो सर्वज्ञ नाही तर तसे नाही. सशाचे शिंग माहीत नसल्याने सर्वज्ञत्वाला बाध येत नाही तसेच जाणीवेच्या पलीकडील स्वतःला न जाणल्याने परमात्म्याच्या सर्वज्ञत्वाला बाध येत नाही. तोच दत्त आद्य, श्रेष्ठ व अंतर्यामी पुरुष आहे.९९.

**आधारभूतः स्थिरजङ्गमानां क्षमास्वरूपस्थितिरस्ति नित्यम् ।**
**आप्यायते यो जगदप्स्वरूपी सर्वाघहृत्स्थास्नुचरिष्णु जीवः ।।१००।।**
**वैश्वानरात्माखिलदेहसंस्थः पचत्यसौ प्राणसखः सदान्नं ।**
**यो भास्वदात्माखिलकर्मसाक्षी विश्वं सदा चेतयते स्वभासा ।।१०१।।**

स्थिर+जङ्गमानां आधारभूतः क्षमा+स्वरूप+स्थितिः नित्यं अस्ति। यः सर्व+अघ+हृत् अप्+स्वरूपी जगत् आप्यायते। (यः) स्थास्नु चरिष्णु जीवः।१००। असौ अखिल+देह+संस्थः वैश्वानर+आत्मा प्राण+सखः सदा अन्नं पचति। यः भास्वत्+आत्मा अखिल+कर्म+साक्षी स्वभासा सदा विश्वं चेतयते।१०१।

**दत्तप्रभूचे अष्टमूर्तित्व** (श्लोक ८३ पहा.) सर्व चराचर सृष्टीचा आधार असणाऱ्या **पृथ्वी**च्या रूपाने तो नित्य स्थित आहे. तो **जल**रूपाने सर्व जगाची पुष्टि करतो, सर्व (कायिक, वाचिक, मानसिक) पापांचा नाश करतो तसेच सर्व स्थावर-जंगमांचा तो आत्मा आहे.१००. **जठराग्नी**च्या रूपाने सर्व देहांत (मानवांत त्रिकोणी, पशूंत चतुष्कोणी, पक्ष्यांत वर्तुलाकृति आणि मत्स्यादिकांत लंबवर्तुलाकार) राहून, हा (अपानसहित) प्राणाचा सखा सदैव अन्नाचे पचन करतो. अग्नीच्या वर पाणी आणि त्या पाण्यावर अन्न ठेवून, अग्नीच्या खाली स्वतः प्राण अग्नीला हळूंहळूं चेतवतो. *(ऊर्ध्वमग्नेर्जलं कृत्वाऽन्नं च जलोपरि। अग्नेश्चाधः स्वयं प्राणः स्थित्वाग्निं धमते शनैः।।* गरुडपुराण प्रेतखंड, धर्मकांड, ३२:४८-४९.) ह्या उक्त्यनुसार तसेच *अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्।।* (भ.गीता १५:१४) ह्या भगवद्वचनाला अनुसरून **सूर्या**च्या रूपाने आपल्या तेजाने सर्व विश्व सदा प्रकाशणारा, सर्व कर्मांचा साक्षी (हाच दत्तप्रभू आहे).१०१.

**योऽब्जो रसात्मा सकलौषधीर्वै पुष्णाति संतापहरोऽखिलेड्यः ।**
**क्षेत्रेषु भूत्वा दशधाखिलेषु प्राणात्मको यः पवतेऽखिलात्मा ।।१०२।।**
**आकाशरूपोऽखिलगोऽपि सौक्ष्म्याद्योऽभेदसङ्गः किल शब्दसंस्थः ।**
**भुनक्ति चोत्क्रामति तिष्ठतेऽपि मूढा विदुर्यं न सदात्मरूपं ।।१०३।।**

यः रस+आत्मा अब्जः संताप+हरः अखिल+ईड्यः वै सकल+औषधीः पुष्णाति। अखिलेषु क्षेत्रेषु दशधा भूत्वा यः प्राण+आत्मकः अखिलात्मा पवते।१०२। आकाश+रूपः अखिल+गः अपि सौक्ष्म्यात् यः अ+भेद+संगः किल शब्द+संस्थः भुनक्ति, उत्क्रामति च तिष्ठते अपि मूढा यं सत्+आत्म+रूपं न विदुः।१०३।

जो रसात्मक **चंद्र** होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो आणि जीवमात्रांचा दाह आपल्या शीतलतेने शमन करून सर्वांकडून स्तविला जातो. प्राणिमात्रांच्या देहांत दशधा होऊन (प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय) वाहणारा जो सूत्रात्मक **प्राण** आहे (*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्..* बृहदारण्यकोपनिषद् ३.७.२).१०२. जो आकाशरूपाने सर्वव्यापी, सूक्ष्मत्वाने अभेद आणि असंग आहे आणि ज्याच्या आश्रयाने शब्द राहतो. जीवरूपाने स्थित असलेल्या, सुखदुःखांचा भोग घेणाऱ्या आणि मृत्यूसमयीं देह सोडून जाणाऱ्या ज्याला अज्ञानी जाणत नाहीत. (*उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्। विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषा।।* (भ.गीता १५:१०).१०३.

**यः सर्वहृत्स्थोऽस्य यतः स्मृतिर्विद् वेदान्तकृद्योऽपि च वेदवेद्यः ।**
**समौ यदंशौ सयुजौ सुपर्णौ वृक्षाश्रितौ भुक्त्यवलोकनोत्कौ ।।१०४।।**
**स त्वं परात्मा पुरुषोत्तम श्रुति-ख्यातः समाविश्य जगत्त्रयं सदा ।**
**ईशाव्ययानन्त बिभर्षि दत्त ते पादाब्जयुग्माय नमोऽस्तु सर्वदा ।।१०५।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्क-युग्रक्ताब्जाभपत्तलः । गूढगुल्फः कूर्मपृष्ठोल्लसत्पादोपरिस्थलः ।।१०६।।**

यः सर्व+हृत्+स्थः यतः स्मृतिः वित्, यः अपि वेद+अन्त+कृत् च वेद+वेद्यः। वृक्ष+आश्रितौ यत्+अंशौ समौ, सयुजौ, सुपर्णौ भुक्ति+अवलोकन+उत्कौ।१०४। सः त्वं परात्मा पुरुष+उत्तमः श्रुति+ख्यातः (हे) ईश, (हे) अव्यय, (हे) अनन्त, (हे) दत्त जगत्+त्रयं समाविश्य बिभर्षि। ते पाद+अब्ज+युग्माय सर्वदा नमः अस्तु।१०५। वज्र+अङ्कुश+ध्वज+अब्ज+अङ्क+युक् रक्त+अब्ज+आभ+पत्+तलः, गूढ+गुल्फः कूर्म+पृष्ठ+उल्लसत् पाद+उपरि+स्थलः,।१०६।

जो सर्वांतर्यामी आहे, ज्याच्यापासून प्राणिमात्रांना स्मृती (पूर्वी अनुभवलेल्या विषयाचे स्मरण) आणि ज्ञान (विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगाची जाणीव) प्राप्त होतात, जो वेदांताचा कर्ता - ज्ञानदाता गुरू आणि संप्रदायाचा प्रवर्तक आहे आणि सर्व वेद विविध देवतारूपाने ज्याचे वर्णन करतात (किंवा जो उपनिषदांत वर्णन केलेला पुरुष आहे). चेतनत्वाने सम (सारख्या स्वभावाचे), सयुज (परस्पर मित्र), सुपर्ण (विश्वकोशानुसार उत्तम गति किंवा सहाय असलेले), गीतेने असंगशस्त्राने छेदण्यास सांगितलेल्या देहरूपी वृक्षाच्या (छेदनार्थी ओव्रूः धातूपासून वृक्ष) आश्रयाने राहणारे, कर्मफलांचा भोग भोगणारा जीव आणि साक्षित्वाने पाहणारा ईश्वर ज्याचे अंश आहेत.१०४. असा जो तो तूं परमात्मा; अचेतन अशा क्षर अशा पदार्थांचा चेतन आणि अक्षर नियंता असल्याने त्यांहून विलक्षण आणि म्हणूनच *'स वा अयमामात्मा', 'सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्यादिपतिः', 'सर्वमिदं प्रशास्ति'* इत्यादि श्रुत्यनुसार पुरुषोत्तम; वेदांनी प्रतिपादित, अव्यय आणि अनंत ईश्वर, त्रैलोक्य व्यापून त्याचे पालन करतोस. तुझ्या पदद्वयांना सतत वंदन असो.१०५.

**जानुपूर्वकजङ्घश्च विशालजघनस्थलः । पृथुश्रोणिश्च काकुत्स्थश्चारुनाभिर्दलोदरः ।।१०७।।**
**अररोरा मांसलांसो युगव्यायतबाहुकः । सुचिह्नचिह्नितकरः कम्बुकण्ठः स्मिताननः ।।१०८।।**
**स्नैग्ध्यधावल्ययुक्ताक्षश्चलत्-पिङ्गजटाधरः । चन्द्रकान्तिः प्रभुः कृष्ण-भ्रूरःश्मश्रुकनीनिकः ।।१०९।।**
**भावशुद्धद्विजाकीर्ण-स्वास्याब्जोऽभीवरप्रदः । दत्तात्रेयः स भगवान्सदा वसतु मे हृदि ।।११०।।**

जानु+पूर्व+जङ्घः च, विशाल+जघन+स्थलः, पृथु+श्रोणिः, च काकु+त्स्थः, चारु+नाभिः, दल+उदरः,।१०७। अरर+उरः मांसल+अंसः, युग+व्यायत+बाहुकः, सु+चिह्न+चिह्नित+करः, कम्बु+कण्ठः, स्मित+आननः,।१०८। स्नैग्ध्य+धावल्य+युक्त+अक्षः, चलत्+पिङ्ग+जटा+धरः, चन्द्र+कान्तिः, कृष्ण+भ्रू+उर+ श्मश्रु+कनीनिकः।१०९। भाव+शुद्ध+द्विज+आकीर्ण+सु+आस्य+अब्जः, अभी+वर+प्रदः, सः भगवान् दत्तात्रेयः प्रभुः सदा मे हृदि वसतु।११०।

**ध्यान -** (हे पायापासून आरंभ करून मुखापर्यंत केले आहे. प्रत्यक्ष पाहून केलेले हे वर्णन आहे. हे ध्यान दिगंबर असून ह्यांत कोणत्याही वस्त्र, आयुध किंवा आभरणांचा उल्लेख नाही. हे ध्यान द्विभुज आहे.) वज्र, अंकुश, ध्वजा आणि कमल या चिह्नांनी युक्त, लाल कमळाच्या रंगाचे तळवे असलेले, कांसवाच्या पाठीसारखे फुगीर वरचा भाग असलेले आणि टांचा झांकलेले ज्याचे पाय आहेत, मांडीच्या वरच्या भागावर एक पाय गंमतीने ठेवलेला आहे; प्रशस्त बैठक असलेला, दिगंबर, सुंदर नाभीसह पातळ पोट असलेला, कपाटासारखी रुंद छाती असलेला, मांसल बाहूंचा, विशाल बाहुद्वयांनी युक्त, ज्याचे हात शुभचिह्नांनी मंडित आहेत, ज्याचा गळा शंखासारखा तीन वलयांनी युक्त आहे, चेहऱ्यावर मधुर स्मित विलसत आहे, ज्याचे डोळे स्निग्ध आणि पांढरे आहेत, (कपाळावर) पिंगट जटा रुळत आहे, चंद्रासारख्या मनोहर कांतीचा, ज्याच्या भिंवया, छाती, दाढीमिशा आणि बुबुळे काळीं आहेत, स्वभावतः निर्मल अशा दंतपंक्तीने ज्याचे मुखकमल शोभत आहे असा आपल्या दोन हातांनी अभय आणि वर मुद्रा दर्शविणारा तो भगवान दत्तप्रभू सदैव माझ्या हृदयांत वास करो. श्रीदत्तात्रयवज्रकवचांत जवळजवळ हेच ध्यान आहे.१०६-११०.

**कलौ द्विराविरासीत्स दीनान्त्रातुं जनान्कलौ । सद्धर्मगुप्त्यै श्रीपाद-नरहर्यभिधानतः ।।१११।।**
**उड्डीयन्ते यथाशक्ति यथोच्चावचपक्षिणः । अनन्तेऽनन्तलीलां तन्न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।११२।।**

**।। इति श्रीगुरुचरिते श्रीगुरुस्तुतिः ।।**

सः कलौ दीनान् जनान् त्रातुं श्रीपाद+नरहरि+अभिधानतः कलौ द्विः आविरासीत्। यथा उच्च+अवच+पक्षिणः अनन्ते यथा+शक्ति उड्डीयन्ते तत् न्यायात् अनन्त+लीलां यथा+मति वक्ष्ये।

कलिकाळांतील दीन जनांचे रक्षण करण्यासाठी, तो श्रीपाद आणि नरहरी या नांवांनी साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी कलियुगांत दोन वेळां अवतरला.१११. असीम गगनांत लहान-मोठे पक्षी जसे आपापल्या कुवतीने भरारी घेतात त्याप्रमाणे मी त्या भगवंताच्या अनंत लीला माझ्या मतीनुसार सांगत आहे.११२.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील श्रीगुरुस्तुति इथे पूर्ण झाली.**
**ती श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री)

## ज्ञानयोगः ।

## प्रथमोऽध्यायः ।

**नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः । यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानन्दसद्गुरुम् ।।१।।**

यत्+अज्ञानात् जगत् रज्जु+अहिवत् उदेति, यत्+तत्त्वं ज्ञानां मीलति तं चित्+आनंद+सत् गुरुं नौमि ।

आतां चरित्राला सुरुवात करतात. ॐ ***रचतो श्रीगुरुदत्तप्रेरणेने श्रीगुरुचरितार्थबोधिनी । पूर्वाचार्यमतानुसारी टीका पहावी निर्मत्सर सर्वांनी ।*** या भूलोकीं ही खरोखर विचित्र, अतिगंभीर आणि दुस्तर अशी माया आहे, जिच्यामुळे हे सर्व जीव परमार्थतः परमार्थरूप असूनही तसा बोध करूनही 'मी परमात्मा आहे' असे उमजत नाहीत. उलट घटादि जड पदार्थांप्रमाणे दिसणाऱ्या अनात्म अशा देह, इंद्रिय आदींच्या संघाताला आपले स्वरूप मानून 'मी ब्राह्मण, अमक्याचा पुत्र' इत्यादि कल्पना (कुणी) न सांगतांही करून घेतात. खरोखर परमात्म्याच्या मायेने भुललेले बहुतेक सर्वही लोक अशा भ्रमांत पडलेले असतात. ह्या भ्रमाच्या परिहारासाठीच मातापित्यांच्या शतपट श्रेष्ठ अशा श्रुतीमाउलीने (वेदरूपी मातेने) आणि परमकारुणिक भाष्यकार पूज्यपाद आचार्यांनी निरनिराळ्या प्रकारे समजावूनही, व्याधीमुळे गोडीसाठी कडुलिंबच सेवण्यास प्रवृत्त होणाऱ्या बालकासारखे, ज्यांचे चित्त विषयाकडे ओढले जाते अशा संसारी जीवांना तो बोध रुचत नाही. त्यासाठी खडीसाखरेसारखा सगुण ब्रह्माच्या प्रसादाच्या फलाद्वारे, त्या संसारी जीवांना आदरपूर्वक परमतत्त्वाकडे प्रवृत्त करण्यासाठी श्रीदत्तप्रभूंच्या प्रेरणेने आत्रेयगोत्री वासुदेव नांवाचा कोणी एक ब्राह्मण, वेदांचे सार ज्यांत आले आहे असा श्रीगुरुचरितम् ग्रंथ रचण्यासाठी, 'काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून, प्रारब्ध भोगूनच संपवून आणि नित्यकर्मांच्या अनुष्ठानाने प्रत्यवाय टाळून अनायासेच स्वरूपाची प्राप्ति हाच मोक्ष', किंवा 'निरतिशय प्रीतीने

स्वर्गादि शब्दांनी निदर्शिलेल्या लोकांची कर्मानेच प्राप्ति होत असल्याने कर्मानेच मोक्ष' इत्यादी पूर्वपक्षांचे निराकरण करून शेवटी 'अविद्या, काम आणि कर्म यांची निवृत्ती करून स्वस्वरूपांत स्थिरावणे हाच मोक्ष; स्वतः आत्माच ब्रह्म असल्याने त्याचे अपरोक्ष ज्ञान झाल्याने अविद्याची निवृत्ती म्हणजेच मोक्ष' ह्या आचार्योक्त्यनुसार साक्षात् मोक्ष देणारे ज्ञानकांडच प्रधान असल्याने, भगवद्‌गुणांसहित ज्ञानकांडाचे निरूपण करण्यासाठी, तसेच त्याच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठी शिष्टाचारानुसार, अनुष्टुभ छंदांत मंगलाचरण केले आहे. **प्रथमाध्यायीं श्रीगुरु स्तविला श्रीगंधर्वपुरी । नामधारका स्वप्नदर्शने कृपा करी ।।१।।**

ज्याच्या अज्ञानाने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे हे जग प्रकटते आणि ज्ञानी लोकांना जे तत्त्व पुनः मिळते त्या चिदानंद सद्‌गुरूंना मी वंदन करतो.

त्या चैतन्य, आनंद आणि सत्यस्वरूपी गुरूंना नमन करतो. कोण हा गुरू? ह्या प्रपंचरूपी आभासाचे अधिष्ठान, जगताचे उपादान कारण, स्वतःच्या माया नांवाच्या अनिर्वाच्य शक्तीने युक्त, सत्य, ज्ञान, अनंत आदि लक्षणांनी युक्त, दत्त नामक जो सर्वेश्वर, त्याच्या अज्ञानाने - अविद्याजनित व्यामोहाच्या बंधनाने, दोरीवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणे हे नामरूपात्मक जगत् उगवते, प्रकट होते. या ठिकाणी रज्जुसर्पाच्या दृष्टांताद्वारे वेदसंमत विवर्तवादाचाच अंगीकार केला आहे; आरंभवाद किंवा परिणामवादांचा नाही. त्यावरून आत्मा हा अवयव, अवयवी पदार्थांत गणला जात नसल्याने, तसेच त्याचे द्रव्यत्वही मानतां येत नसल्याने, त्याचा जगताशी समवाय अथवा संयोग संबंध होऊं शकत नाही, तर केवळ अध्यासच जाणावा. अशा अज्ञानापासूनच प्रपंचाची उत्पत्ति सांगितली. अशा प्रकारचे हे जगत् ज्याला न जाणल्याने (ज्याच्या अज्ञानाने) प्रकटते आणि **यत्तत्त्वं** ज्या (अज्ञानामुळे पसरलेल्या) जगताचे तात्त्विक स्वरूप **ज्ञानां** विवर्ताच्या (आभासाच्या) अधिष्ठानभूत परब्रह्माला अभेदाने जाणणाऱ्यांना **पुनर्मीलति** परत लोप पावते. त्याला नमस्कार करतो असा संबंध आहे. दोरी आणि सर्प यांचा दृष्टांत देहलीदीप न्यायाने दोन्हीकडे लागूं आहे. लौकिक

अनुभवांत दोरीचा विवेक केल्यावर जशी 'हा सर्प आहे' ही बुद्धी दूर होते, तसेच ज्यांना सच्चिदानंदाचा विवेक होतो त्यांचा तद्विपरीत जगदाभास *'यतो वाचो निवर्तन्ते'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मानंदवल्ली २:४) ह्या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे तो मिथ्या असल्याने नाहीसा होतो. हेच असे सांगतां येईल कीं विवर्तावर अध्यासलेले जगत् अज्ञानाचा विलास असल्याने दोरीवर भासणाऱ्या सापासारखे मिथ्या होण्याच्याच योग्यतेचे आहे.

इथे एक अशी शंका उपस्थित होऊं शकते की जगताच्या उत्पत्तीचे कारण ब्रह्मदेव (किंवा प्रधान) आहेत असे वेदांत सांगितले आहे. तर इथे परमेश्वरापासूनच जगताची उत्पत्ति प्रतिपादिली आहे. याचे समाधान असे आहे. 'जो ब्रह्मादेवाला आधी निर्माण करतो (*यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम्*)' हे वेदवाक्य (श्वेताश्वतर उ. ६:१८) आणि *'गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे'* हे गीतावचन ब्रह्मदेव परमेश्वराचा शिष्य असल्याचे प्रतिपादन करतात. तसेंच *'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्'* (श्वेताश्वतर उ. ४:१०) ह्या मंत्रानुसार माया ही परमेश्वराचीच शक्ती आहे आणि ती अचेतन आहे त्यामुळे परमेश्वरालाच जगदुत्पत्तीचे कारण मानावे लागेल.

**चित्** चैतन्यस्वभाव, जड नसलेला, स्वयंप्रकाश; निरतिशय, निरुपाधिक, नित्य आनंद सत्य, त्रिकालाबाधित असा हा गुरूच जगताच्या उत्पत्ति, स्थिति, लय यांचे कारण आहे; ब्रह्मा, प्रधान, अणू किंवा असत् हे नाहीत. शारीरकमीमांसेच्या दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत *'रचनानुपपत्तेच'* अशी सुरुवात करून आठ अधिकरणांत ह्या सर्व मतांतरवादांचे निराकरण केलेले आहे. ते तिथेच पहावे. त्याचप्रमाणे *'तस्माद्वा एतस्मादात्मान आकाशः संभूतः'* (तैत्तिरीय उ. ब्रह्मवल्ली २.१), *'यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. भृगुवल्ली ३.१) हेच दर्शवितात.

इथे (**चिदानंदसद्** ह्या पदांत) संसर्ग वा विशिष्ट वाक्यार्थ न घेतां (श्रीमच्छंकराचार्यांनी) वाक्यवृत्तींत सांगितल्याप्रमाणे

(*संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र संमतः। अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषो मतः।।३८।।*) अखंडार्थ घ्यावा. गुरुशब्दाने दर्शविलेले *ब्रह्म चिदानंदसत्* ह्या शब्दांसहित अखंडैकरस जाणावेत. उदाहरणार्थ लोहितोष्णप्रकाशप्रदीप. लाल, उष्ण आणि प्रकाश हे दीपांत एकाच वेळी जाणवतात आणि त्यापासून अभिन्न असतात.

इथे जीवाचे संसारित्व आणि दुःखित्व हे नित्य आहे ह्या वादाच्या निरासासाठी पुनः शब्दाची योजना करून *'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'* (बृहदारण्यक उ. ४.४.६) ह्या वेदवाक्याचा अर्थ स्पष्ट केला आहे.

**ज्ञानाम्** हे अनेकवचन वापरून 'एकमुक्तौ सर्वमुक्तिप्रसंगः' ह्या पक्षाचे निरसन केले आहे. ज्ञ शब्दाने *'ज्ञोऽत एव'* (ब्रह्मसूत्र २.३.१८) ह्या अधिकरणन्यायाची पुष्टी केली आहे. ह्याने जीवाचे नित्यत्व, चिद्रूपत्व (ते अचिद्रूप - जड नाही) सुचविले आहे. कारण सुषुप्ति आदि अवस्थांतही तो साक्षित्वाने असतो. तर मग सुषुप्त्यादि अवस्थांत द्वैताची प्रतीती कां नसते? असे म्हणाल तर बृहदारण्यक उपनिषदांत (४.३.२२) 'यद्वै तन्न पश्यति' असे म्हटले आहे. किंवा *'यः सर्वज्ञः सर्ववित्'* (मुंडक उ. १.१.९) ह्या श्रुतीप्रमाणे **ज्ञ** शब्दाचा अर्थ ईश्वर असा करतां येईल. म्हणजेच ज्ञानी हा सर्वेश्वराहून वेगळा नाहीच. *'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति'* (मुंडक उ. ५.२.९) ह्या श्रुतीने आणि *'ज्ञानी त्वात्मैव मे मतः'* ह्या भगवद्वचनाने (भ.गीता ७.१८) ह्याचे समर्थन केले आहे.

हे शास्त्र आरंभणीय आहे की नाही असे विचाराल तर विषय आणि प्रयोजन असल्यामुळे *'अथातो ब्रह्मजिज्ञासा'* (ब्रह्मसूत्र १.१.१) या न्यायानुसार ते आरंभणीय आहे. सर्व अनर्थांचे मूळ असलेल्या प्रपंचाची निवृत्ती हे प्रयोजन आहे. तसेच ह्या प्रपंचरूपी विवर्ताचे अधिष्ठान जे ब्रह्म त्याचे ज्ञान हा विषय आहे. त्या(ब्रह्मज्ञाना)ची इच्छा करणारा साधनचतुष्टयसंपन्न ब्राह्मण हा अधिकारी आहे असे समजावे।।१।।

**भात्यनेकवदेकं सद्धीभेदादेकरूपया । विदास्यैक्यं परं ब्रह्म तत्सत्यं दत्तसंज्ञितम् ।।२।।**

एकं सत् परं ब्रह्म धी+भेदात् अनेक+रूपया भाति। विदा अस्य ऐक्यं तत् सत्यं दत्त+संज्ञितम्।२।

एकच परब्रह्म असूनही बुद्धिवृत्तींच्या भेदांमुळे अनेकासारखे भासते. ह्याचे ज्ञानाने ऐक्य होते तेच दत्त नांवाचे सत्य होय. 'श्रेयांसि बहुविघ्नानि' ह्या उक्तीला अनुसरून *'एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः। एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत्।'* (त्रिपुरतापिनी उ. ५.१२), *'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'* (पैंगल १.१), *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०), *'नेह नानास्ति किंचन'* (बृहदारण्यक उ. ४.४.१९) ह्या वेदवाक्यांनी प्रतिपादिलेले ऐक्यात्म्य वस्तुनिर्देशात्मक (आणखी एका) मंगलाचरणाद्वारे सांगतात. *'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्'* (छांदोग्य उ. ६.२.१) ह्या श्रुतीने द्वैताचा निषेध करून प्रतिपादिलले **एकं** सजातीय आणि विजातीय भेदांनी रहित, **सत्** त्रिकालाबाधित देश, काल, वस्तु अशा कुठल्याही विभागणीच्या पलीकडील **परं ब्रह्म** परब्रह्म **धीभेदात्** अंतःकरणाच्या उपाधीमुळे, देव, मानव, पशु आदि अनेक रूपांनी **अनेकवत्** वि**भाति** भासते **तत्** ते खरे तर *'तत्त्वमसि'* (छांदोग्य उ. ६.८.७) ह्या उपनिषद्वाक्यानुसार एकच आहे.

**शंका -** सृष्टीच्या पूर्वी आपण म्हणतां तसे ते एकच असेलही. आतां स्थितीच्या काळांत सर्वांच्या अनुभवाच्या प्रत्यक्षादि प्रमाणानुसार सर्वांच्या प्रत्ययाला येणारे खाणे-पिणे इत्यादि व्यवहारांतले जगत् नामरूपात्मकच असून ते अनेकत्वानेच बनलेले आहे.

**समाधान -** भागत्यागलक्षणेच्या द्वारा **विदा** ज्ञानाने **अस्य** ह्या विद्यमान जगच्चालक व भासक सत्याचे **ऐक्यं** एकत्व *'अयमात्मा ब्रह्म'* (बृहदारण्यक उ. २.५.१९) ह्या श्रुतिवचनाप्रमाणे निर्बाध आहे.

**पर्यायी अर्थ -** किंवा असेही म्हणतां येईल की पहिल्या श्लोकाने तत्पदार्थ सांगितला आहे व ह्या दुसऱ्या श्लोकाने त्वंपदार्थ! **एकं** साक्षित्वाने जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनही अवस्थांत विद्यमान असणारे, **सत्** प्रत्यग्रूप, **धीभेदात्** (धी शब्दाचा इंद्रिय असा अर्थ करून) भिन्न भिन्न श्रोत्रादि इंद्रियांच्या शब्दादि विषयांच्या उपाधींमुळे **अनेकवत्** विखुरल्यासारखे भासते. प्रत्यक् रूप स्वभावतः शुद्ध असूनही मलिन उपाधींमुळे नाना रूपांनी नटल्यासारखे दिसते. जेव्हां उपाधिविशिष्ट गुणधर्मांना सोडून त्या त्या उपाधींच्या लक्ष्याचा शाखाचंद्रन्यायाने विवेक केला असतां उपाधिजनित अपकर्षाचा निरास होऊन प्रकृष्ट (आत्मरूपच) उरते. तेच चैतन्य श्रोत्रादि उपाधींत प्रवेशून ती ती कार्ये करतांना दिसले तरी उपाधिविशिष्ट चैतन्य गौण असून प्रत्यक् चैतन्यच मुख्य आहे. हाच विचार बृहदारण्यक उपनिषदांत (१.४.७) *'स एव(ष) देहे प्रविष्टः'* (तोच हा (जीव) देहांत प्रवेश करून) अशी सुरुवात करून *'तन्न पश्यांत्यकृत्स्नो हि स प्राणन्नेव हि प्राणनामको भवति वदन् वाक् पश्यंचक्षुः, शृण्वन् श्रोत्रं मन्वानो मन एतानि कर्मनामधेयानि भवन्ति'* असा विशद केला आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनी याचा असा अर्थ केला आहे. देहांत नखशिखांत प्रवेश करून ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या उपाधींचा आश्रय केलेल्या त्या आत्म्याला विवेकी पुरुष आपला आत्मा मानत नाहीत. कारण तो उपाधिविशिष्ट आत्मा एकसंध अविच्छिन्न नसतो. मग त्याला मुख्यात्मत्व कुठून येणार? प्राणचालनाने श्वासोच्छ्वास करतांना प्राणोपाधीच्या योगे तो प्राणनामक होतो. वाचा आदि उपाधींशी त्याचा संबंध तेव्हां नसतो. त्याचप्रमाणे एका एका उपाधीशी संलग्न असतांना तो इतरत्र जात नाही. जसे वाचेशी संलग्न असतांना तो चक्षु वा इतर उपाधीपासून दूर असतो. असा भिन्न भिन्न उपाधीच्या आश्रयाने तो विच्छिन्न भासतो. तर त्याला एकसंध वा अखंड कसे मानतां येईल? अशी शंका घेतल्यास त्याचे उत्तर असे आहे - शब्दादि उपाधिविशिष्ट भावांचा त्याग करून एकरूप **विदा** बुद्धीने **अस्य** ह्या प्रत्यगात्म्याचे **ऐक्यं** एकत्व कळते. बृहदारण्यकांतही म्हटले आहे *'आत्मानमेवोपासीत तर्ह्येके एकीभवन्ति'* (१.४.८). **तत्** ते एकत्वाने निचित केलेले **सत्यं** पूर्ण, निर्बाध, तत्त्वंपदार्थांच्या सामरस्याने अखंडैकरस **दत्तसंज्ञित** दत्त नामक पूर्ण ब्रह्म होय.

सूर्यपक्षी ह्या श्लोकाचा असा अर्थ लावतां येईल. *‘एकैव वा महानात्मा देवता। स सूर्य इत्याचक्षते’* (कात्यायनकृत ऋग्वेदसर्वानुक्रमणिकांतर्गत द्वादशकांडी परिभाषा २.१४.१५) इत्यादींनी सांगितलेले सूर्यात्मक तेज *‘सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च’* (ऋग्वेद १.११५.१) याप्रमाणे **एकं सत्** एक असूनही *‘इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुः’* (ऋग्वेद १.१६४.४६) इत्यादि श्रुतिप्रणीत देवतारूप **धीभेदात्** बुद्धीने *‘एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति’* (ऋग्वेद १.१६४.४६) या वेदवाक्यानुसार **अनेकवत् भाति** अनेक देवतारूप भासतो.

विष्णु, दत्तात्रेय, देवी, शिव यांच्या पक्षी **एकं सद्** त्या त्या देवतांचे एकच रूप वरच्या, खालच्या, उजव्या, डाव्या इत्यादि हातांनी धारण केल्या आयुधांच्या **धीभेदात्** निरनिराळ्या क्रमांच्या विचाराने **अनेकवत्** विभिन्न व्यूहांसारखा (केशव, नारायणादि) भासतो. त्यानुसार चतुर्भुज विष्णूचे २४, षड्भुज श्रीदत्तात्रेयाचे ७२०, अष्टभुजा देवीचे ४०३२० तर दशभुज शिवाचे ३५२८८०० भेद जाणावेत।।२।।

**बोद्धुं भूत्वात्रिपुत्रः स्वपदरसपरान्दिव्ययोगेन बालान् ।**
**दत्ताख्यः कार्तवीर्यं यदुमपि च समान्स्वाश्रितानुद्दधार ।**
**भूयोऽन्यान् श्रीपदाख्यः पुनरपि नृहरिः संज्ञया स्वीयभक्तान्।**
**कृष्णाभीमातटस्थो जयति परगुरुः स्मर्तृगाम्येष दत्तः ।।३।।**

स्व+पद+रस+परान् कार्तवीर्यं यदुं अपि च समान् स्व+आश्रितान् बालान् दिव्ययोगेन बोद्धुं दत्त+आख्यः अत्रिपुत्रः भूत्वा भूयः श्रीपद+आख्यः पुनः अपि नृहरिः स्वीय+भक्तान् उद्दधार। एष कृष्णा+भीमा+तट+स्थः पर+गुरुः स्मर्तृगामी दत्तः जयति।३।

आपल्या पदाच्या रसांत निमग्न असणाऱ्या, कार्तवीर्य आण यदु यांसारख्या आपल्याला शरण आलेल्या बालकांचा अत्रि मुनींच्या पोटी दत्त नांवाने अवतरून उद्धार केला. पुढेही श्रीपाद व नंतर नरहरि नाम धारण करून आपल्या इतरही भक्तांचा उद्धार करून तो परगुरु, स्मर्तृगामी दत्त कृष्णा आणि भीमा यांच्या तीरांवर विराजत आहे. हे (उपरिनिर्दिष्ट) वर्णन मुनिपुत्र दत्तात्रेयाला कसे लागूं पडेल ह्या शंकेच्या अपेक्षेने सांगतात. आपल्या षड्गुण ऐश्वर्यासह, स्वतःच्या शुद्ध चिदानंदैक स्वरूपानेच लोकशिक्षणासाठी - स्वात्मतत्त्वाच्या **बोद्धुं** उपदेशासाठी - उपासना, योग आदि उपायांनी प्राप्त होणाऱ्या स्वात्मतत्त्वाच्या ज्ञानासाठी *'अधीहि भगवो ब्रह्म'* (तैत्तिरीय उ. ३.१.१) ह्या उक्तीप्रमाणे तसेच *'आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च'* या ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) **अत्रिपुत्रो भूत्वा** अत्रिमुनींच्या घरी अवतरून **स्वस्य पदं** पद्यते म्हणजे योग्यांना प्राप्त होते ते पद; देश-काल-वस्तु यांनी अपरिच्छिन्न असा जो चिन्मय आनंदरूपी रस, *'रसो वै सः'*, *'रसँ ह्येवायं लब्ध्वानन्दी भवती।'* (तैत्तिरीय उ. २.७.१) ह्या श्रुतींनी वर्णिलेला स्वरूपानंद; त्यांत निमग्न असलेल्या **बालान्** बालकाप्रमाणे मानावमानचिंतारहित निरागस वृत्ती धारण केलेल्या; सगुणपक्षी आपल्या चरणाच्या भजनाच्या आनंदांत मग्न असलेल्या व बालवत् विषयांत रमणाऱ्या, कृतवीर्याचा मुलगा **कार्तवीर्य** तसेच ययातिपुत्र **यदु** आणि **समान्** त्यांच्यासारख्या इतर सर्व **स्वाश्रितान्** आपल्या प्रह्लादादि भक्तांचा **दिव्ययोगेन** दिव्य म्हणजे ज्ञानात्मक उपनिषत्प्रणीत

योग म्हणजे उपाय. ह्या योगाचा अवलंब करणाऱ्यांचे गर्भावास, जन्म, जरा इत्यादी क्षीण होतात किंवा नाश पावतात आणि ते ब्रह्माकडे प्रगत होतात. ह्या योगाचा उगम उपनिषदांत असल्याने व वेदांनी ब्रह्माला औपनिषद पुरुष म्हटले असल्याने, (*'तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि।'* बृहदारण्यक उ. ३:९:२६) तो दिव्य योग आहे. उपनिषदांचे शाब्द ज्ञान परोक्ष असले तरीही त्याच्या श्रवण-मननांनी संशयभावना, असंभावना आणि विपरीतभावना दूर होऊन तेच अपरोक्ष ज्ञानांत परिणत होते. दिव्य योग या शब्दाचा अर्थ, *'आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिं। ध्याननिर्मथनाभ्यासात् देवं पश्येन्निगूढवत्।।'* (ध्यानबिंदूपनिषत् २२) (आत्म्याची अरणी आणि प्रणवाचा मंथा करून ध्यानरूपी मंथनाच्या अभ्यासाने अंतरांत लपलेला देव (प्रकट करून) पहावा.) ह्या वचनानुसार ध्यानयोग असाही करतां येईल. *'नान्यः पंथा विद्यतेऽयनाय'* (आत्मप्राप्तीसाठी दुसरा मार्ग नाही) (श्वेताश्वतर उ. ३:८, ६:१५) ह्या मंत्रानुसार या अष्टांगयोगाने आणि ज्ञानयोगाने **उद्दधार** *'पादोऽस्य विश्वा भूतानि'* (ऋग्वेद संहिता १०:९०:३) ह्या मंत्रांत प्रतिपादलेल्या मायाप्रपंचरूपी पायाच्या वर त्याच मंत्रांत पुढे सांगितलेल्या *'त्रिपादस्यामृतं दिवि'* तेजोमय, स्वयंप्रकाश अशा अमृतस्वरूप परब्रह्मांत अभेदाने ठेवले. म्हणजेच उपरिनिर्दिष्ट स्वभक्तांना आपल्यासारखेच केले. जरी निरंश अनंत अशा ब्रह्माच्या ठायीं अंशाची कल्पनाही करतां येत नाही तरीही *'निरंशेऽप्यंशमारोप्य कृत्स्नेंऽशे वेति पृच्छतः। तद्भाषयोत्तरं ब्रूते श्रुतिः श्रौतहितैषिणी।।'* (अंशरहित ब्रह्मावर अंशाची कल्पना करून त्याच्याविषयी पूर्ण कीं अंश असे विचारणाऱ्याला, ऐकणाऱ्याच्या हितासाठीच श्रुतिमाउली त्याच्याच भाषेंत उत्तर देते) (पंचदशी २:५८) ह्या वचनानुसार समोरच्याला त्याच्याच भाषेच समजावण्यासाठी तसा शब्दप्रयोग केला आहे. **भूयः** पुन्हां कांही काळाने श्रीपाद श्रीवल्लभ नांवाने **अन्यान्** आणखी भक्तांचाही उद्धार केला. कलियुगांतच **पुनरपि** पुन्हा एकदा नरहरि नांव घेऊन सिद्ध सरस्वती आदि **स्वीयभक्तान्** आपल्या भक्तांचा उद्धार केला. अशा रीतीने भगवंताची कृपाच भक्तांच्या मोक्षाला कारण होते. *'एष एव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो उन्निनीषते एष*

**योऽजोऽक्रियोऽस्पृहोऽप्येको बहुः स्यामिति तृष्णया । प्रकृत्या गुणमय्येदं ततानेशो जगत्प्रभुः ।।४।।**

यः अजः अक्रियः अस्पृहः प्रभुः अपि एकः बहुः स्याम इति तृष्णया गुणमय्या प्रकृत्या जगत् ततान।४।

*एवासाधुकारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो निनीषते।'* (हाच परमात्मा यमलोकांपासून वर काढण्यासाठी सत्कर्माची प्रेरणा देतो आणि हाच यमलोकांत ढकलण्यासाठी दुष्कर्माकडे प्रवृत्त करतो.) (कौषीतकी ब्राह्मण उ. ३:८) ही वेदोक्ति हेच सांगते. ह्यांत परमेश्वराला वैषम्य (पक्षपात) आणि नैर्घृण्य (दुष्टपणा) हे दोष किंवा त्याचे पापपुण्य लागत नाहीत. कारण तो ज्याला त्याला आपापल्या कर्मानुसार फळे देत असतो. कृष्णाकांठी नरसोबावाडी इत्यादि ठिकाणी तसेच भीमातीरी गाणगापूर येथे राहणारा दलादनमुनींच्या वचनानुसार **स्मर्तृगामी** 'स्मरतां दर्शन देणारा' **एषः** हा स्वयंप्रकाश अपरोक्ष **परगुरुः** पर म्हणजे ब्रह्मदेवादिक, त्यांचाही पतंजलींच्या वचनानुसार (*स एव पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्*)(काळाने न भंगणारा तोच प्राचीनांचाही गुरू आहे) (योगसूत्र १:२६) गुरु, **दत्तः** दत्तप्रभू **जयति** स्वभक्तांचा उद्धार हाच जय मिळवीत आहे. ३.

**यः** जो आधीच्या लोकांत वर्णन केला तो **अजः** जन्म, वृद्धी, परिणाम, अस्तित्व, क्षय आणि नाश या सहा विकारांच्या पलीकडला (*'महानज आत्मा'* बृ.उ. ४:४:२४); **अक्रियः** क्रिया म्हणजेच कर्माच्या अतीत असलेला. हे पातंजल योगसूत्रातील क्लेश, कर्म, विपाक, आशय ह्यांचे उपलक्षण आहे. (*'क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः'* योगसूत्र १:२४); **अस्पृहः** वेदांत वर्णिल्याप्रमाणे आप्तकाम (बृ.उ. ४:४:६) असल्याने निरिच्छ; **एकः** ऐतरेय उपनिषदांत (१:१:१) सांगितल्याप्रमाणे (*आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्*) अद्वितीय; अशा ईश्वरापासून जगत् निर्माण होणे असंभव असल्याने वेदवचनांनी मायासहित उपादानाच्या विधानांना (*'मायां तु प्रकृतिं विद्यात्'* श्वे.उ. ४:१०), (*'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते'* ऋ.सं. ६४:७:१८) अनुसरून ईश्वराने मायेचा अंगीकार केला. ह्याचा अर्थ माया ही ईश्वरापासून भिन्न आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. कारण ती ईश्वराचीच शक्ती असून तिला वेगळे वस्तुत्व नाही.

त्यामुळे तिची वेगळी गणना करतां येत नाही. कांही कार्यासाठी मालकाने आपल्या चाकराला दिलेले धन जसे त्याचे होत नाही किंवा पाण्यात पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला शहाणा माणूस दुसरा चंद्र म्हणत नाही त्याप्रमाणे! हेच व्यास महर्षींनी *'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टांतानुपरोधात्'* (१:४:२३) या सूत्राद्वारे प्रतिपादले आहे. हा जो परमेश्वर तो केवळ निमित्तकारणच नसून तोच प्रकृतिरूप उपादानही आहे. वेदांत एका ब्रह्माचे विज्ञान झाले की सर्वांचे विज्ञान होते असे विधान (सर्वविज्ञानप्रतिज्ञा) आहे. (*'येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातम्'*, छां.उ. ६:१:३). त्याला जोडूनच मातीच्या गोळ्याचा दृष्टांत आहे. एका मातीच्या वस्तूचे ज्ञान झाले की सर्व मृन्मय वस्तूंना जाणल्यासारखे आहे. त्या वस्तूंना विविध आकारांनुसार निरनिराळी नांवे दिली तरी त्या सर्वांचे स्वरूप मातीचेच आहे. (*'यथा सोम्येकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद् वाचारंभणं विकारो नामधेयम्'*, छां.उ. ६:१:४) वरील प्रतिज्ञेनुसार आणि दृष्टांताच्या अनुरोधाने प्रकृति ईश्वरापासून अभिन्न आहे असे प्रतिपादन व्यासांनी ह्या सूत्रांत केले आहे. **गुणमय्या प्रकृत्या** अशा ह्या त्रिगुणात्मक प्रकृतीद्वारा **ईश** सर्वज्ञ, स्वतंत्र, भगवान प्रभु, **बहु स्याम्** अनेक रूपें धारण करावीत **तृष्णया** अशा इच्छारूपी संकल्पाने **जगत् ततान** विश्वाचा पसारा मांडला. ईश्वर *'सत्यकाम सत्यसंकल्प'* (छां.उ. ८:१:५) असल्याने त्याचा संकल्प केवळ मनोराज्य नसल्याने प्रत्यक्षात उतरतो. ह्यासाठी ईश्वराला फारसे प्रयास पडले असे नाही. *'स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीप्रमाणे तपोरूपी साधनाची अपेक्षा असली तरी *'बहुः स्याम्'* ह्या संकल्पांत अंतर्भूत असलेले, निर्माण करायच्या जगताचे पर्यालोचन (conception) हेच ते तप होय. कृच्छ्रादि नव्हे. *'यस्य ज्ञानमयं तपः'* (मुं.उ. १:१:३) असे श्रुतिवचनच आहे. **जगत् ततान** असे म्हटले आहे ते घटादिकांप्रमाणे जड नव्हे. तर पुढच्याच लोकांत सांगितल्याप्रमाणे देह, बुद्धी, इंद्रिये यांच्यापासून बनलेले आहे. कुंभाराने घडवलेल्या, घडा, सुरई इत्यादि मातीच्या वस्तूंपासून वेगळे, ज्याचे निमित्त आणि उपादान कारण एकच (ईश्वर) आहे. जीवांच्या कर्मादिकांनुसार देश, काल, नाना रूपे, पूर्वकल्पासारखेच सर्वही प्राणिमात्रांना अनुभवाला येणारे असे हे जगत् आहे. त्याच्या अंतरांत, पाहणारा, ऐकणारा, विचार करणारा, जाणणारा इत्यादि विशेषणांनी युक्त अशा स्वरूपांत *'तत्सृष्ट्वा*

**आब्रह्मस्तम्बपर्यन्तं देहबुद्धीन्द्रियात्मकम् । सृष्टं चराचरं तत्र संवित्पात्रं नरोत्तमः ।।५।।**

आ+ब्रह्म+स्तंब+पर्यन्तं देह+बुद्धि+इन्द्रिय+आत्मकं चर+अचरं सृष्टम्। तत्र नर+उत्तमः संवित्+पात्रम्।५।

*तदेवानुप्राविशत्'* (तै.उ. २:६) ह्या श्रुतीनुसार अनुप्रवेश करून त्याचा विस्तार केला. हा अनुप्रवेश घरांत प्रवेशणारा देवदत्त अथवा जलांत प्रतिबिंबित झालेला सूर्य यांसारखा नसून द्रष्टा इत्यादि लक्षणांनी युक्त जीवरूपाने होणारा आहे.४.

ब्रह्मदेवापासून स्थावरांपर्यंत देह, बुद्धी, इंद्रिये धारण करणारे जे चराचर (जीवमात्र) ईश्वराने निर्मिले आहेत त्या सर्वांत श्रेष्ठ मानवच (ईश्वरी) ज्ञानाचा अधिकारी आहे.

*'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे'* ह्या ऋचेनुसार (१०:१२१:१) व *'स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते'* ह्या पुराणवाक्यानुसार (कूर्मपुराण पूर्वभाग ४:३८) ब्रह्मदेव हेच आद्य व श्रेष्ठ शरीरधारी असल्याने त्यांच्यापासून स्थावरांपर्यंत देहबुद्धीन्द्रयात्मक जगताची उत्पत्ति केली. त्या सर्वांत ज्ञानयोग्य असे केवळ मानवशरीरच आहे. ऐतरेय उपनिषदांत सांगितले आहे की ईश्वराने अचेतन लोकांच्या रक्षणासाठी देवांची निर्मिती केली. त्यांच्या प्रार्थनेनुसार भगवंताने गाय इत्यादि पशू (अस्तित्वांत) आणले. त्या सर्वांत 'हा आम्हांला पुरेसा नाही' (*'न वै नोऽयमलम्'*, ऐ.उ. १:२:२) असे म्हणणाऱ्या देवतांना जेव्हां शेवटी विवेकसंपन्न माणूस (अस्तित्वांत) आणला तेव्हां 'हे फार छान केले' (*'सुकृतं बत'*, ऐ.उ. १:२:३) असे त्या म्हणाल्या. ऐतरेय आरण्यकांतही मनुष्याचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. 'मानवांतच आत्म्याचा विकास होतो. तोच प्रज्ञानसंपन्न होतो. ज्ञानाची अभिव्यक्ति करतो, ज्ञान पाहतो, उद्यांची (भविष्याची जाणीव) त्यालाच आहे; इहपरलौकिकांना जाणून मर्त्य असूनही अमृतत्वाची इच्छा करतो. अर्थातच तहान, भूक इत्यादि शारीरिक प्रवृत्ती हीच ज्ञानाची परिसीमा असणाऱ्या इतर पशूंपेक्षा तो संपन्नतम आहे' (ऐ. आरण्यक २:३:२). ज्ञानकर्मांची शक्ती व जिज्ञासा असणारा व त्यांच्या तत्त्वाला जाणू शकणारा पुरुषच साधक, विद्वान् व समर्थ असल्याने त्यालाच ज्ञान व कर्म यांचा

अधिकार आहे.

**विषय -** ‘शास्त्रयोनित्वात्’ (शास्त्राच्या उगमावरून) ब्रह्मसूत्राप्रमाणे (१:१:३) अद्वितीय आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचा एकमेव उगम असल्याने उपनिषद हा विषय होय.

**अधिकारी -** त्याचा अधिकारी ब्राह्मण होय. कारण तोच विवेकाने ‘हे मना! तू का असा पिशाचासारखा सूसाट धावत आहेस? स्वतःसाठी म्हणावे तर तू जड असल्याने प्रयोजन होऊं शकत नाहीस. विषयांसाठी म्हणावे तर ते क्षणभंगुर इत्यादि दोषांनी ग्रस्त असल्याने तुझ्या धांवपळीचे प्रयोजन असूं शकत नाहीत. चैतन्याच्या प्राप्तीची जर तुझी इच्छा असेल तर ते असंग, परमानंदस्वरूप असल्याने ते तुझ्या धांवाधांवीने नाही तर तुझ्या (मनाच्या) नियंत्रणाने, विषयकल्पनांचा त्याग करून ‘मी ब्रह्म आहे’ ह्या एकाच विषयशून्य वृत्तीने ब्रह्मभावाची अभिव्यक्ती करणाऱ्या महावाक्यांच्या चिंतनांतूनच उगवणाऱ्या बुद्धिवृत्तीद्वाराच जाणतां येईल.’

इथे **नरोत्तम** या शब्दाने बुद्धीने परमार्थप्राप्तीचा निश्चय ज्याने केला आहे असा ब्राह्मण असा घ्यावा. गरुडपुराणांत म्हटले आहेच ‘सर्व जीवांमध्ये प्राणी श्रेष्ठ आहेत, त्यांतही बुद्धिजीवी, बुद्धिमानांत माणूस, माणसांतही ब्राह्मण, ब्राह्मणांत विद्वान् आणि विद्वानांत कृतबुद्धी श्रेष्ठ जाणावेत.’ (‘भूतानां प्राणिनः श्रेष्ठास्तेभ्यो बुद्ध्युपजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणाः स्मृताः। ब्राह्मणेषु च विद्वांसो। विद्वत्सु कृतबुद्धयः।।’ गरुड पुराण, प्रेतखंड, धर्मकांड, १२:११).५.

**इन्द्रियार्थे स्थितौ रागद्वेषौ येन जितौ स तु । दैवीसंपल्लभेन्मोक्षं तदर्थं संभवत्यजः ।।६।।**

इन्द्रिय+अर्थे स्थितौ राग+द्वेषौ येन जितौ दैवी+संपत् सः तु मोक्षं लभेत्। तत्+अर्थं अजः संभवति।६।

विषयांच्या ठिकाणी असलेले आकर्षण आणि तिरस्कार जिंकून जो दैवी संपत्ती मिळवतो त्यालाच मोक्षाचा लाभ होतो. त्याच्यासाठीच जन्म-मरणादि विकार नसलेला परमात्मा (या मनुष्यलोकांत) जन्म घेतो. 'स्वयंभू परमात्म्याने इंद्रियरूपी छिद्रे बहिर्मुख छेदली असल्याने (जीव) अंतरात्म्याला न पाहतां बाहेर पाहतो.' (कठ उ. २:१:१), 'ज्याचे श्रवणसुद्धा फार लोकांना लाभत नाही, श्रवण करणाऱ्यांतही बहुतेकांना जो समजत नाही' (कठ उ. १:२:७), 'वस्तऱ्याच्या धारेवर चालणे जसे कठीण तसा हा (परमात्मज्ञानाचा) मार्ग दुर्गम आहे' (कठ उ. १:३:१४) असे जर उपनिषदांतच सांगितले आहे तर त्या ज्ञानाची योग्यता मनुष्याला येते असे कसे म्हणतां येईल? अशी शंका घेतल्यास 'कुणी धीर पुरुष अमृतत्वाच्या इच्छेने आपल्या इंद्रियांचा संयम करून प्रत्यगात्म्याचे दर्शन घेतो' (कठ उ. २:१:१), 'शहाण्याने वाचेचा मनांत संयम करावा आणि त्याचा (मनाचा) निग्रह आत्मज्ञानासाठी करावा' (कठ उ. १:३:१३), 'जो केवळ आत्म्यालाच वाहून घेतो त्यालाच हा आत्मा आपल्या स्वरूपाची ओळख करून देतो' (कठ उ. १:२:२३) इत्यादि श्रुतींच्या प्रतिपादनावरून ही शंका निराधार आहे हे स्पष्ट करण्यासाठी ह्या श्लोकांत म्हणतात. सर्वच इंद्रियांच्या विषयांच्या ठिकाणी 'सुखाशी संलग्न असणारा राग' व 'दुःखाशी निगडित असणारा द्वेष' या पातंजल (२:७) उक्तीनुसार पूर्वजन्मातील संस्कारांनी घडलेल्या जीवाच्या प्रकृतींतील अनुकूल व प्रतिकूल प्रवृत्ती **येन** ज्याने भगवंताच्या ध्यानादिकांनी **जितौ** जिंकल्या आहेत **स तु** त्या रागद्वेषरहित साधकाला **दैवीसंपत्** दैवी संपदा प्राप्त होते व त्याचे अज्ञानकल्पित स्थूल देहापासून अहंकारापर्यंतचे सर्व बंध तुटून **मोक्षं लभेत्** मोक्ष मिळतो. श्रीमद्भगवद्गीतेतील *'इन्द्रियस्येन्द्रियार्थे..'* (३:३४) व 'दैवी संपद्विमोक्षाय' (१६:५) ह्या श्लोकांत हेच सांगितले आहे. गीतेच्या १६व्या अध्यायांत दैवी संपदेचे निरूपण आहे. **तदर्थं** त्या मोक्षाला योग्य अशा आपल्या भक्तासाठीच **अजः** अजन्मासुद्धा भगवंत **अवतरति** भूतलावर अवतरतो.६.

**गाढं प्रियोऽस्य भगवांस्तस्यायमपि तादृशः । गुप्त्या अवतरत्यस्य लीलाधाम्नाप्यजोऽव्ययः ।।७।।**
**युगे युगेऽवतीर्यापि कार्यान्ते व्यसृजत्तनूः । एवं ब्राह्मेऽह्नि संप्राप्तो युगाष्टाविंशपर्ययः ।।८।।**

अस्य भगवान् गाढं प्रियः, अयं अपि तादृशः। अस्य गुप्त्या अजः अव्ययः लीला+धाम्ना अवतरति।७। युगे युगे अवतीर्य अपि कार्य+अन्ते तनूः व्यसृजत्। एवं ब्राह्मे अह्नि युग+अष्ट+विंश+पर्ययः संप्राप्तः।८।

गीतावचनानुसार (७:१७) ह्या(भक्ता)चे भगवंतावर प्रगाढ प्रेम असते तसेच त्या(भगवंता)चेही तसेच ह्याच्यावर प्रेम असते. ह्याच्या रक्षणासाठीच जन्म-मृत्युरहित परमात्मा लीलादेहाने अवतार घेतो.७.

युगायुगांत अवतरून कार्याच्या शेवटी त्या त्या देहांचे विसर्जन करतो. अशा रीतीने ब्रह्मदेवाच्या २८व्या चतुर्युगीत सांप्रत दिवशीं वर्तमान वाराह कल्पांत, ('सध्याच्या वैवस्वत मन्वंतरांत' अध्याहृत आहे.).८. ह्या घोर कलियुगांत आपल्या अंशापासून झालेल्या देवतांची दयाशून्यता लक्षांत घेऊन खुद्द दत्त भगवंतांनीच अवतार घेतला.

**घोर कलियुग.** अधर्माच्या प्राबल्यामुळे कली घोर झाला आहे. ह्या कलीत *'मानव सगळे धर्मभ्रष्ट व लिंगजिह्वापरायण (असतील); ब्रह्मचारी व्रतहीन, संन्यासी कुटुंबवत्सल,।।१।। स्त्रिया कामासक्त तर गृहस्थ आचारहीन (असतील). ते देहाने छोटे, खूप खाणारे, मंदभागी, निर्लज्ज,।।२।। स्त्रीलंपट, विपुल संतति असलेले, मूर्ख आणि आपल्या नातेवाइकांना आणि मित्रांना सोडणारे,।।३।। स्त्रिया पतीची अवज्ञा करणाऱ्या, तर पुत्र पित्याचा द्रोह करणारे; नोकर धन्याला टाकणारे तर शिष्य पूर्णपणे गुरूला ठकविणारे!।।४।। म्लेच्छप्राय राज्यकर्ते प्रजेचे आर्थिक दृष्ट्या भक्षण करतील, ब्राह्मण कवडीसाठीही वेदांचा विक्रय करणारे, दुष्ट,।।५।। प्रतिग्रह आणि परस्त्री यांच्या मागे लागल्याने सिद्धिविवर्जित असतील. उच्चवर्णीय लोक हीन व्यवसाय करतील तर हीन लोक श्रेष्ठांचे।।६।। यज्ञयाग बंद झाल्याने वृष्टी आणि अन्न कुठेकुठेच उपलब्ध होईल (दुष्काळसदृश स्थिती).*

**दारुणेऽस्मिन्कलौ प्राप्ते ज्ञात्वा स्वांशांशजोतयः। दयोना इत्याविरासीद्दत्तस्तु भगवान्स्वयम् ।।९।।**

अस्मिन् दारुणे कलौ प्राप्ते स्व+अंश+अंश+ज+ऊतयः दया+ऊना इति ज्ञात्वा स्वयं भगवान् दत्तः तु आविरासीत्।९।

*पुरुष १६व्या वर्षी म्हातारे होतील (केस पांढरे) तर १0 वर्षाच्या मुली माता होतील.।।७।। राज्यकर्तेच चोर, धर्मांत पाखण्डच अधिक, सर्व वर्ण शूद्रप्राय आणि मेंढीएवढ्या गाई।।८।। घरासारखे (भोगसाधनांनी समृद्ध) मठादिक तर घरे ओसाड होतील. वनस्पती अणूंप्रमाणे सूक्ष्म तर वृक्ष शमीप्रमाणे लहान।।९।। ढग नुसते विजेसारखे चमकतील (वर्षणार नाहीत); असे सर्व कलियुगांत घडणार आहे.* (दत्तपुराण ८:८:२३-३२) अशा ह्या दारुण कलीच्या काळांत **स्वांशांशजोतयः** स्वांश म्हणजे आपला अंश ब्रह्मदेव, त्याचे अंश मरीचि, कश्यपादि मानसपुत्र, त्यांपासून जन्मलेले इन्द्र, मरुद्गण, वसु, आदित्य इत्यादि **ऊतयः** विभूति म्हणजे देवता माणसाच्या पापामुळे त्यांच्याविषयी तिरस्काराने **दयोना** निर्दय झाल्या **इति** असे जाणून **स्वयं भगवान् दत्तस्तु आविरासीत्** स्वतः भगवान् दत्तांनी अवतार घेतला. ज्याप्रमाणे नोकरचाकरांवर कार्य सोपवलेले असले तरी ते सर्व दमून भागून गेल्यावर एखादे तांतडीचे कार्य उपस्थित झाले असतां स्वतः मालकच काम करूं लागतो आणि त्याला पाहून थकलेले असले तरी ते नोकर आपसुकच कामाला लागतात त्याप्रमाणे. असे न मानल्यास देव विषम (म्हणजे पक्षपाती) आहे असे वाटेल.९.

**स कृष्णामरजातीर-विहारी लोकपावनीः । भिक्ष्वात्मनात्र सल्लीलाः कृत्वाऽदृश्योऽस्ति तत्र हि ।।१०।।**
**ॐकारोच्चारणं जातमात्रेण नयनं तथा । स्वर्णतामयसोऽभ्यासमृतेऽपि ब्रह्मपाठनम् ।।११।।**
**तत्त्वोपदेशनं पित्रोर्बाल्ये तीर्थाटनं तथा । योगाख्यापनसंन्यास-वर्त्मसंस्थापनेऽन्यथा ।।१२।।**

सः कृष्णा+अमरजा+तीर+विहारी भिक्षु+आत्मनः लोक+पावनीः सत्+लीलाः कृत्वा तत्र अदृश्यः अस्ति हि।१०। जातमात्रेण ॐकार+उच्चारणं, तथा अयसः स्वर्णतां नयनं, अभ्यासं ऋते अपि ब्रह्म+पाठनम्।११। पित्रोः तत्त्व+उपदेशनं, तीर्थ+अटनं तथा योग+आख्यापनं+संन्यास+वर्त्म+संस्थापने अन्यथा..।१२।

तो कृष्णा आणि अमरजा यांच्या तीरांवर विहरणारा, संन्यासी रूपानें, लोकांना पावन करणारा मंगल लीला करून तिथे अदृश्य रूपांत आहेच. **स** तो अवतरलेला प्रभु. भिक्षु = संन्यासी. नास्तिकांना अदृश्य असला तरी भक्तांना (तसा) नाही. (म्हणजे भक्तांना आजही दर्शन देतो.) **हि** प्रसिद्ध ह्या अर्थाने.१०. (इथून पुढे आठ श्लोकांत ह्या अवताराचे भगवत्स्वरूप अघटितघटनापटुत्वाद्वारे प्रदर्शिले आहे. यालाच अष्टश्लोकी गुरुचरित्र असेही म्हणतात.) जन्मताच ॐकाराचा उच्चार, लोखंडाचे सोने करणे, अभ्यासाविनाही वेदांचे पठण; **जातमात्रस्य** साधारण नवजात बालकाला श्वास घेण्यालाही प्रयत्नांची आवयकता असते. त्या वेळीच लोकांत प्रसिद्ध असलेले **ॐकारोच्चारणं** ह्याचे ॐकाराचे उच्चारण ह्याच्या ईश्वरत्वाचे गमक आहे. **अयसः स्वर्णतां नयनं** कांही रासायनिक प्रक्रियांनी नव्हे तर केवळ हाताच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने करणे, **अभ्यासमृते** गुरूंजवळ जाऊन अभ्यास न करतांच एकदम **ब्रह्मणो** वेदांचा **पाठनम्** पाठ करणे,११. **पित्रोः** आई-वडिलांना **तत्त्वोपदेशनं** तत्त्वज्ञानाचा उपदेश, **बाल्ये** वयाच्या आठव्या वर्षींच तीर्थयात्रेला जाऊन **योगाख्यापन** योगाचा उपदश करणे तसेच संन्यामार्गाची प्रतिष्ठापना करणे, अन्यथा (पुढील श्लोकांत वाक्य पूर्ण होते).१२.

**कथं भाव्यं द्राग्घरणं प्रतीपाचरणै रुजः । तथाऽवाचोऽपि विद्वत्ता-दानं साग्विप्रदुर्गतेः ।।१३।।**
**हरणं त्रिस्थलीयात्रा-चरणं मृतजीवनम् । वशागोदोहनं विश्व-रूपाविष्करणं यतौ ।।१४।।**
**विद्वद्गर्वापहरणं निन्द्यास्याद्वेदवाचनम्। विश्वस्ताया अवैधव्य-दानं कर्मप्रकाशनम् ।।१५।।**
**जरदेधःपल्लवतां नयनं निष्कलस्त्रियै । सुप्रजस्त्वार्पणं कुष्ठ-हरणं दृष्टिमात्रतः ।।१६।।**

(अन्यथा) कथं भाव्यम्? प्रतीप+आचरणैः रुजः द्राक् हरणं तथा अवाचः अपि विद्वत्ता+दानं, विप्र+दुर्गतेः साग् (हरणं),।१३। हरणंत्रि+स्थली+यात्रा+चरणं, मृत+जीवनं, वशा+गो+दोहनं, यतौ विश्व+रूप+आविष्करणं।१४। विद्वत्+गर्व+अपहरणं, निन्द्य+आस्यात् वेद+वाचनं, विश्वस्ताया अवैधव्य+दानं, कर्मप्रकाशनम्।१५। जरत्+एधः पल्लवतां नयनं, निष्कल+स्त्रियै सु+प्रजस्त्व+अर्पणं, दृष्टिमात्रतः कुष्ठ+हरणम्।१६।

**अन्यथा कथं भाव्यं** श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींच्या साक्षात् ईश्वरस्वरूपाशिवाय दुसऱ्या कोणत्या उपपत्तीने ह्या सर्व चमत्कारांचा उलगडा होऊं शकतो? हे पुढे वर्णिलेल्या सर्व चमत्कारांना लागूं होते.१३. प्रतिकूल आचरणानेच (कुपथ्य करूनच) तात्काळ रोग घालविणे. तसेच जीभ नसलेल्या (ब्राह्मणाला) विद्वत्तेचे दान करणे, विप्राची दुरवस्था (दारिद्र) लगेच घालविणे, निमिषमात्रांत गंगानुजाला त्रिस्थळीची यात्रा घडविणे, ब्राह्मणाच्या मरण पावलेल्या मुलाला जिवंत करणे, वांझ म्हशीचे दोहन करणे; **वशागो** इथे म्हशीला अनुलक्षून आहे; किंवा *वशा अगो* अशी फोड करून गाईव्यतिरिक्त ती म्हैस असाही अर्थ करतां येईल. (त्रिविक्रम भारती) यतीला विश्वरूप दाखविणे,१४. विद्वान् ब्राह्मणांचा गर्व उतरविणे, पतिताच्या मुखाने वेदपठण, आपल्यावर विश्वासलेल्या विधवेला (तिचा मृत पती जिवंत करून) सौभाग्यदान, कर्मकांडाचे प्रकाशन,१५. जीर्ण (औदुंबर) काष्ठाला पालवी आणणे, ऋतुहीन (वृद्ध व वांझ) स्त्रीला उत्तम संतती प्राप्त करून देणे, केवळ दृष्टिक्षेपाने (नंदीचे) कुष्ठ घालविणे,१६.

**क्षणेऽष्टग्रामगमनं छिन्नसस्यविवर्धनम् । इत्यादिकं कृतं दिव्यं करोति च करिष्यति ॥१७॥**
**भपार्थिवरजोऽम्ब्वंश-गणकाः सन्तु कुत्रचित् । भूयोऽगणेयोरुगुण-गुणान्गुणयितुं ह्यलम् ॥१८॥**
**लीलाप्रादुष्कृतगुण-रूपोऽरूपोऽगुणोप्यरम् । श्रवःसृत्या प्रविश्यांतर्भक्तस्याघं धुनोत्यजः ॥१९॥**

क्षणे अष्ट+ग्राम+गमनं, छिन्न+सस्य+विवर्धनम्। इत्यादिकं दिव्यं कृतं, करोति च करिष्यति।१७। भ+पार्थिव+रज+अम्बु+अंश+गणकाः कुत्रचित् सन्तु। भूयः अगणेय उरु+गण+गुणान् गु(ग)णयितुं हि अलम्।१८। अरूपः अगुणः अजः अपि लीला+प्रादुष्कृत+गुण+रूपः श्रवः+सृत्या अंतः प्रविश्य भक्तस्य अघं धुनोति।१९।

(दिवाळीच्या) उत्सवांत (एकाच वेळी) आठ गांवीं जाणे, (अकाळी) कापलेल्या पिकाचे संवर्धन इत्यादि (चमत्कार त्या श्रीगुरूंनी) (पूर्वी) केले, (आजही) करतात व (पुढेही) करणार आहेत. आठ प्रिय भक्तांच्या प्रार्थनेनुसार आठही गांवीं जाऊन त्यांच्यासह दिवाळी साजरी केल्याची कथा पुढे येणार आहे.१७. आकाशांतील तारे, भूमीवरील धुळीचे कण किंवा (समुद्राच्या वा पावसाच्या) पाण्याचे थेंबही मोजणारे कुठे (कुणी कदाचित्) सांपडतील पण अनंतगुणसंपन्न परमेश्वराचे गुण मोजणे (कधीच संपणार नसल्याने) पुरे झाले. इथे *'विष्णोर्नु कं वीर्या..'* (ऋग्वेद सं. १:१५४:१) ह्या वेदवाक्याचा आशयच सुचविलेला आहे. *'वेवेष्टीति विष्णुः'* म्हणजेच सर्वव्यापी भगवंत त्याचे *'वीर्याणि'* पराक्रम (लीला) *'कः प्रवोचत'* कोण वर्णू शकेल? 'नु' खरोखर कुणीच नाही. *'यः पार्थिवानि रजाँसि विममे'* जो पृथ्वीवरील धूलीचे कण(ही कदाचित्) मोजील तोसुद्धां नाही. *'यो विष्णुः त्रेधा विचक्रमाणः'* तीन पावलांनी *'सधस्थं'* तेथील निवासी देवांसह *'उत्तरं लोकं'* पलीकडच्या सत्यलोकाला *'अस्कभायद्'* भिडून *'स्थः'* स्थिरावला आहे. निर्गुण आणि निराकार असूनही केवळ लीलेनेच धारण केलेल्या गुणांच्या रूपाने हा अजन्मा श्रवणेंद्रियांच्या द्वारे भक्तांच्या अंतरांत प्रवेश करून (त्यांची) पापे नष्ट करतो.१९.

**तदेकनिष्ठः पूतात्मा जीवन्मुक्तो भवेत्ततः । निर्द्वन्द्वस्यारब्धभुजो देहः पततु वा न वा ।।२०।।**
(क्षेपकः) **तत्राज्ञानसमुत्पन्न-द्वंद्वाभावः प्रवर्तते । प्रारब्धान्ते स यात्येव कैवल्यं पदमुत्तमम् ।।**
**अयं हि ब्रह्मभूयाप्ति-सत्पथो नाक्षिगोचरः । मोहान्धानामसत्संग-विवेकानां कुसंपदाम् ।।२१।।**

ततः तत्+एक+निष्ठः पूत+आत्मा जीवन्+मुक्तः भवेत्। निर्द्वन्द्वस्य आरब्ध+भुजः देहः पततु वा न वा।२०। तत्र अज्ञान+समुत्पन्नः +द्वंद्व+अभावः प्रवर्तते। सः प्रारब्ध+अन्ते उत्तमं कैवल्यं पदं याति एव।(क्षेपकः।) अयं ब्रह्म+भूय+आप्ति+सत्+पथः अ+सत्+सङ्ग+विवेकानां मोह+अन्धानां कु+संपदां न हि अक्षि+गोचरः।२१।

मग तो एकनिष्ठ भक्त शुद्धचित्त होऊन जिवंतपणीच मुक्त होतो. सुखदुःखादि द्वंद्वांपलीकडे जाऊन प्रारब्धाचा भोग घेतो; मग त्याचा देह पडो वा न पडो. **ततः** पापक्षालन झाल्यावर **तदेकनिष्ठः** भगवत्परायण असल्याने **पूतात्मा** शुद्ध म्हणजेच रागद्वेषादि विकाररहित अंतःकरण झाल्याने अपरोक्ष अनुभूति प्राप्त करून घेऊन **जीवन्मुक्तो भवेत्** जिवंतपणीच मुक्त होतो. **निर्द्वंद्वस्य** भगवद्गीतेत *'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः। वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते'* (२:५६) असे वर्णन केल्याप्रमाणे स्थितप्रज्ञ होऊन **आरब्धभुजः** प्रारब्ध भोग भोगत राहतो. मग **देहः** पडो वा न पडो.२०. तिथे अज्ञानजन्य द्वंद्वाचा अभावच असतो. (असा हा जीवन्मुक्त) प्रारब्ध (भोगून) संपल्यावर श्रेष्ठ असे मोक्षपद पावतो (विदेहमुक्त होतो.) (क्षेपक). मात्र हा ब्रह्मपदप्राप्तीचा सन्मार्ग संतसंगति आणि विवेक यांच्या अभावीं मोहांध झालेल्या, आसुरी संपदेचा आश्रय केलेल्यांच्या डोळ्यांना दिसत नाही.

गरुडपुराणांत सांगितल्याप्रमाणे, 'सत्सङ्गश्च विवेकश्च निर्मलं लोचनद्वयम्। यस्य नाऽस्ति नरः सोऽन्धः कथं न स्यादमार्गगः।।' सत्संग आणि विवेक हे दोन स्वच्छ नेत्र ज्याला नाहीत तो मानव आंधळाच होय. (मग) तो आडवाटेला लागणार नाही का? नाकापासून कानापर्यंत पसरलेले दोन डोळे असलेल्यांना डोळस मानले तरी सूक्ष्म कार्याची पाहणी सत्संग आणि विवेक ह्याच नेत्रद्वयांनी होते. त्यांचा अभाव असणारा आंधळाच होय. म्हणून तो आडवाटेला - म्हणजे दुराचरणाने पशु आदि योनींच्या गतीला जातो (विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे। वासुदेव निर्मल देहे जेणे त्वत्पदिं राहे।।).२१.

**कृतस्ववर्णाश्रमदृष्टकर्मा विद्वान् सदिष्टो गुरुदेवभक्तः ।**
**इहैव भुक्तिं च लभेत मुक्तिं संन्यास्यनेनैव पथा स योगी ।।२२।।**

कृत+स्व+वर्ण+आश्रम+दृष्ट+कर्मा सत्+इष्टः गुरु+देव+भक्तः विद्+वान् सः योगी संन्यासी (च भूत्वा) अनेन एव पथा इह एव भुक्तिं मुक्तिं च लभेत।२२।

आपल्या वर्णाला आणि आश्रमाला उचित असे कर्म केल्याने तो संतांचा लाडका होतो. त्याच कारणाने तो सद्‌गुरू आणि ईश्वर यांचा उपासक होतो. याच मार्गाने तो गीतेच्या वचनानुसार *('अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः। स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः' ।।६:१।।)* विद्वान् म्हणजे ज्ञानी होतो. विहित कर्माचे निष्काम अनुष्ठान केल्याने विविदिषा उत्पन्न होते आणि ईश्वराभिन्न सद्‌गुरूंची भक्ती हीच उपासना केल्याने चित्ताला एकाग्रता येते. तिच्या योगाने वेदांत निर्देशिलेली शमदमादि (*'शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति।'* सुबालोपनिषत् ९:१४) आत्मविद्येची अंतरंग साधने सिद्ध होतात. अशा रीतीने आत्मज्ञानाचा मुख्य अधिकारी झाल्यावर सद्‌गुरूंना शरण जाऊन श्रवणादींनी **विद्वान् सन्** ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुक्तीचा लाभ करून घेतो. तसेच तैत्तिरीय उपनिषदांत (आनंदवल्ली) वर्णन केलेल्या सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंतच्या एकाहून एक शंभरपट आनंदांचा भोगही घेतो. मोक्षाच्या ठायीं कामादिविषयांचा भोग वस्तुतः नसतो. तथापि विषयांनंदांचा समावेश ब्रह्मानंदांत अंशत्वाने असल्याने ब्रह्मानंदाची प्राप्ती झाली की सर्व विषयांचा भोग घेतल्यासारखाच होतो. वेदांतसूत्रांत (*'ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्।'* ३:४:५१) सांगितल्याप्रमाणे (प्रारब्धाचा) प्रतिबंध नसेल तर ह्याच जन्मांत तो मुक्त होतो. अन्यथा प्रतिबंध असेल तर तो जन्मातराने मुक्त होतो.२२.

**एवं सुवृत्तं महिमानमीशितुः श्रुत्वास्य भीमामरजागमे ययौ ।**
**कश्चिद्भवभ्रष्टमनाः स्तुवन्गुरुं तप्तः शरण्यं श्रितकल्पशाखिनम् ।।२३।।**
**गणेशं शारदां नत्वा श्रीगुरुं नामधारकः। द्विजस्तुष्टाव घोरेऽत्र नृधाम्ना विश्रुतं हरिम् ।।२४।।**

एवं अस्य ईशितुः सुवृत्तं महिमानं श्रुत्वा कश्चित् तप्तः भव+भ्रष्ट+मनाः श्रित+कल्प+शाखिनं शरण्यं गुरुं स्तुवन् भीमा+अमरजा+गमे ययौ।२३। नामधारकः द्विजः गणेशं शारदां श्रीगुरुं नत्वा अत्र घोरे नृ+धाम्ना विश्रुतं हरिं तुष्टाव।२४।

ह्या पहिल्या २२ लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी द्विसाहस्री या आपल्या गुरुचरित्राच्या अनुवादात्मक ग्रंथाचा उपोद्घात केला आहे. मंगलाचरण, चरित्रनायक, ग्रंथाचा विषय, अधिकारी, सूत्ररूप चरित्र, भगवद्गुणांच्या श्रवणकीर्तनाचे माहात्म्य इत्यादि विषय यांत आले आहेत. आतां पुढील लोकापासून मूळ श्रीगुरुचरित्राचा उपोद्घात उर्वरित अध्यायांत अनुवादला आहे. असे हे भगवान दत्तात्रेयांचे शुभ वर्तमान व माहात्म्य ऐकून (आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक अशा त्रिविध तापांनी) पोळलेला आणि त्यामुळेच संसाराला विटलेला विरक्त असा कोणी एक ब्राह्मण श्रीगुरूंची स्तुती करीत भीमामरजा संगमावर लीलेने निवास करणाऱ्या, लोकांना मात्र पादुकारूपानेच दिसणाऱ्या, स्वभक्तांचा कल्पवृक्ष आणि म्हणूनच शरण जाण्याला योग्य अशा भगवंताकडे गेला.२३. त्या नामधारक नांवाच्या ब्राह्मणाने श्रीगणेश आणि शारदा यांना वंदन करून या घोर कलियुगांत मनुष्यरूपाने (अवतरलेल्या) सुप्रसिद्ध दैन्य, दुःख, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. सरस्वतीपंत ह्या नांवाने प्रसिद्ध आणि श्रीगंगाधरांचा पुत्र असणाऱ्या त्या ब्राह्मणाने आपल्या अभिमानाच्या परिहारासाठी नामधारक हे कल्पित नांव घेतले. ऐतरेय आरण्यकांत (*'तस्य वाक्तन्तिर्नामानि दामानि तस्येदं वाचातन्त्या नामभिर्दामभिः सर्वं सितम्।'* २:१:६) म्हटल्याप्रमाणे नाम हे दाम म्हणजे बंधन आहे. श्रीदत्तप्रभूंच्या साक्षात् दर्शनाच्या इच्छेने त्यांना स्तुतीने प्रसन्न करण्यासाठी, प्रथम निर्विघ्नसिद्धीसाठी गणेशादींना वंदन करून ह्या घोर कलियुगांत नरहरि नांव धारण केलेल्या दत्तात्रेयांचे स्तवन करूं लागला.२४.

**सर्वज्ञ मां न जानीषे विश्वसाक्षिन्न चेक्षसे । विलापो न श्रुतो विष्णो मम श्रुत्वाप्युपेक्षसे ।।२५।।**
**चेज्ज्ञातेऽत्र क्व वैक्लव्यं कथं दैन्यं त्वयेक्षिते । श्रुते चेच्छुक्कुतोऽप्यर्हा त्वय्युपेक्षा दयानिधे ।।२६।।**
**सर्वदेवेश्वरोऽपि त्वं त्वं नोऽपि कुलदैवतम् । त्वां हित्वा कतमं याचे वेद्मीशन्त्वापि वेत्सि माम् ।।२७।।**

(हे) सर्वज्ञ (अपि) मां न जानीषे? (हे) विश्व+साक्षिन् न च ईक्षसे? (हे) विष्णो मम विलापः न श्रुतः? श्रुत्वा अपि उपक्षसे (किम्)।२५। चेत् ज्ञाते अत्र क्व वैक्लव्यम्? त्वया ईक्षिते कथं दैन्यम्? श्रुते चेत् कुतः शुक्? (हे) दया+निधे त्वयि उपेक्षा अर्हा अपि?।२६। त्वं सर्व+देव+ईश्वरः अपि, त्वं नः कुल+दैवतं अपि। (हे) ईश, त्वां हित्वा कतमं याचे? त्वां वेद्मि (त्वं) अपि मां वेत्सि।२७।

हे सर्वज्ञा, तूं मला ओळखत नाहीस (का?) हे विश्वसाक्षी देवा, तू मला पाहत नाहीस (का?) हे व्यापनशीला माझा शोक तू ऐकत नाहीस (का?) कीं तू ऐकूनसुद्धा उपेक्षा करतो आहेस? मुण्डकोपनिषदानुसार (*'यः सर्वज्ञः सर्ववित्।'* १:१:९) हे सर्वज्ञा, मला ओळखत नाहीस का? इथे **अपि** प्रश्नार्थक आहे. (अमरकोश ३:३:२४९). विशेषणांची योजना हेतुगर्भ आहे. सर्वज्ञ असूनही मला कसा जाणत नाहीस? विश्वसाक्षी असून मीच कसा दिसत नाही? सर्वव्यापी असूनही माझा विलाप ऐकत नाहीस? असा भावार्थ.२५. देवाला उद्देशून योजलेली सर्वही संबोधने अन्वर्थक असूनही विपरीत अनुभव का येतो आहे हे या श्लोकांत विचारले आहे. जर तू मला ओळखतोस तर मग मी असा विह्वळ का? जर तू (माझ्याकडे) पाहत असशील तर माझे दैन्य कसे आहे? (माझा विलाप) तुझ्या कानांवर पडूनही (माझा) शोक (अजूनही) कसा राहिला? हे दयासागरा, तुला ही उपेक्षा शोभते का? अर्थात् मुळीच नाही!२६. 'अरे कार्याला उशीर लागतो. उशीर सहन होत नसेल तर आणखी कुठल्या तरी देवाकडे जा.' असे म्हणाल तर आपल्यासारखा दुसरा (समर्थ) कोणी नाही हे सांगतात. आपणच सर्व देवांचे अधिदेव आहां. आमचे कुलदैवत आहां. आपल्याला सोडून कुणाकडे (कोणत्या इतर देवाकडे) याचना करूं? 'कशावरून?' म्हणाल तर मी आपल्याला सर्व देवांचा देव म्हणून शब्दप्रमाणाने जाणतो. कारण आपणच गीतेत *'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः'* (१५:१५) असे सांगितले आहे. आपण तर मला भक्ताला प्रत्यक्षच जाणतां.२७.

**सर्वोऽपि वेत्ति भूपं न भूपः सर्वन्तथोचितम् । अज्ञे तु त्वयि सर्वज्ञे कथं श्लाघ्यमिदं प्रभो ।।२८।।**
**नासेवकायादात्रेऽपि चेद्दास्यस्युचितं न तत् । सेवेच्छुः श्रीश किं दाता तद्वत्प्रत्युपकार्यपि ।।२९।।**
**ज्योतिर्द्योतमिहाब्दोम्बु सेवोनेऽर्पयति ध्रुवे । पदं बिभीषणेऽदात्रोर्दत्तं मे देह्यतः प्रियम् ।।३०।।**

सर्वाः अपि भूपं वेत्ति, न भूपः सर्वम्। तथा तु अज्ञे(भूपे) उचितम्। (हे) प्रभो त्वयि सर्वज्ञे इदं कथं श्लाघ्यम्?।२८। असेवकाय अदात्रे अपि न दास्यसि इति चेत् न तत् उचितम्। (हे) श्री+ईश, सेवा+इच्छुः तत् वत् प्रति+उपकारी अपि दाता किम्?।२९। इह ज्योतिः द्योतं, अब्दः अम्बु, सेवा+ऊने अर्पयति। अदात्रोः ध्रुवे, बिभीषणे (च) पदं दत्तम्। अतः मम प्रियं देहि।३०।

'राजाला सगळे ओळखतात पण राजा सर्वांना (विशेषतः) ओळखत नाही; तसेच हे आहे' असे आपण म्हणाल तर अल्पज्ञ राजाच्या बाबतीत हे कदाचित् योग्य ठरेल पण आपण तर सर्वज्ञ आहांत. आपल्याला हे कसे शोभेल?२८. ते असो! सेवा न करणाऱ्याला व (कांही) न देणाऱ्याला आपण देत नाही असे म्हणणेही आपल्याला योग्य नाही. आपण श्री म्हणजे अव्याहत ऐश्वर्याचे धनी आहांत. या विशेषणाने दान देण्याची क्षमता आणि औदार्य आपल्या ठिकाणी आहे हे सुचविले आहे. सेवेची अपेक्षा करणाऱ्याला दाता म्हणतां येईल का? किंवा सेवेच्या अपेक्षेने दान करणारा *किंदाता* निकृष्ट दाता ठरेल. तेच प्रत्युपकारकर्त्याविषयीही म्हणता येईल. सीतेच्या शोधानंतर हनुमंताला श्रीरामप्रभु म्हणतात 'हे वानरश्रेष्ठ! तुझा हा उपकार माझ्यांतच जिरून जावो. प्रत्युपकाराची अपेक्षा करणारा माणूस उपकारकर्त्यावर विपत्ति येण्याची इच्छा करतो.' (*'मय्येव जीर्णतां यातु उपकारो हरे तव। नरः प्रत्युपकारार्थी विपत्तिमभिवाञ्छति।।'* उत्तरकांड ४०:२४).२९. 'तरी अशा प्रकारचे दान कुठे पाहिलंस का?' असा प्रश्न अपेक्षून म्हणतात. इथे (इहलोकी) सूर्यचंद्राग्निरूप ज्योति प्रकाशाचे, तसेच मेघ पाण्याचे दान, सेवा न करणाऱ्याही सर्व लोकांना देतात. आपल्याला कांहींच न दिलेल्या ध्रुव आणि बिभीषण या दोघांना अढळपद आणि राज्य आपणच दिले आहे. तरी मला माझे प्रिय असे तुझे दर्शन दे.३०.

**निधयस्तेऽनुगा दास्यः सिद्धयः श्रीस्तु किङ्करी । तत्ते किं भगवन्देयं किं कार्यं परिपूर्ण ते ।।३१।।**
**स्वसेवककुलं भूमौ पालयन्ति नृपा अपि । कुतो मोपेक्षसे दीनं मत्पूर्वार्चित विश्वभृत् ।।३२।।**
**देवेश मेऽपराधैश्चेदायास्यन्तर्विषादताम् । पत्ताडितार्भकैः किं नु प्रसू रुष्यति मानुषी ।।३३।।**

(हे) भगवन्, निधयः ते अनुगाः, सिद्धयः दास्यः, श्रीः तु किङ्करी। तत् (हे) परिपूर्ण ते किं देयम्? ते किं कार्यम्?।३१। भूमौ नृपाः अपि स्व+सेवक+कुलं पालयन्ति। (हे) विश्व+भृत्, मत्+पूर्व+अर्चित कुतः मां दीनं उपेक्षसे?।३२। (हे) देव+ईश, चेत् मे अपराधैः विषादतां आयास्यन्तः, मानुषी (अपि) प्रसू पत्+ताडित+अर्भकैः रुष्यति किम्?।३३।

'त्या वेळी दिले. आतां थोडे घेऊन देतो' असे म्हणाल तर निधि आपले अनुचर आहेत, सिद्धी आपल्या दासी आहेत, साक्षात् लक्ष्मी आपल्या चरणाची सेवा करते, आपल्याला काय देतां येईल? अर्थात् कांहीच नाही. किंवा आपण नित्यच परिपूर्ण असल्याने आपले कांही कार्यही करतां येणार नाही.३१. याउप्परही आपण अपेक्षा करीत असाल तर असे पहा, ह्या भूलोकांत मनुष्यांतील राजेसुद्धा आपल्या नोकरांच्या वंशजांचे पालन करतात ना? माझ्या वाडवडिलांनी पूजलेल्या देवा, मज दीनाची का उपेक्षा करतोस? इथे मी जरी सेवा केली नसली तरी माझ्या पूर्वजांच्या सेवेचा विचार करून माझी उपेक्षा करूं नका असे सुचविले आहे. **विश्वभृत्** विश्वाच्या पोशिंद्या, असे संबोधन योजून माझा विश्वांतच अंतर्भाव असल्याने माझ्या भरणपोषणाची जबाबदारी आपलीच आहे असे म्हणायचे आहे. नाही तर मला विश्वाच्या बाहेर करावे लागेल असा भाव आहे.३२. किंवा हे देवाधिदेवा, माझ्या अपराधांनी आपल्याला राग आला असे म्हणावे तर गर्भांत किंवा मांडीवर असलेल्या लेंकराने लाथा मारल्या तरी मानवी माता रागावते का? मुळीच नाही! मग देवांचेही देव असलेल्या आपल्याला असा रोष शोभत नाही.३३.

**जीवनं पितरौ यत्र भिन्नावन्यतराच्छिशोः । त्वं तूभयं मे किं कार्यं निर्घृणे विश्वभृत्त्वयि ।।३४।।**
**साहसं कुरु मेत्युक्त्वा यथा दारु भिनत्ति विः । तथा साहजिकैर्दोषैर्निन्दाम्यंहः करोम्यहम् ।।३५।।**

यत्र पितरौ भिन्नौ अन्यतरात् शिशोः जीवनम्। मे तु त्वं उभयम्। (हे) विश्वभृत्, त्वयि निर्घृणे किं कार्यम्?।३४। 'साहसं मा कुरु' इति उक्त्वा यथा विः दारु भिनत्ति तथा साहजिकैः दोषैः अहं निन्दामि, अहः करोमि।३५।

तसे तर (वेदांतदृष्ट्या) या जगताचे उपादान कारण आणि निमित्त कारणही तुझ्याकडेच येते; (कारण तूच हे विश्व स्वतःपासूनच निर्माण केले आहे. *'स ईक्षत लोकान्नु सृजा'* इत्यादिना तुझे निमित्तत्व, तर *'तदाऽऽत्मानँ स्वयमकुरुत्'* या वाक्याने उपादानतत्व, सिद्ध होते. अशा रीतीने तुझे अभिन्न निमित्तोपादानत्व वेदप्रामाणित आहचे. पण लौकिक अथवा सांख्य दृष्ट्या जरी विचार केला तर बालकाचे (वेदांत न जाणणाऱ्या जीवाचे) माता आणि पिता दोघे निरनिराळे असल्याने शिशूची उपजीविका त्यांच्यापैकी एकाकडूनही होऊं शकते. (इथे **पितरौ** ह्याचा अर्थ एकशेष द्वंद्व समासानुसार माता आणि पिता असा होतो.) तू तर सर्वेश्वर असल्याने, उपनिषदांवर विश्वासलेल्या मला दोन्ही - माता आणि पिता, आहेस. आपणच गीतेत (९:१७) 'मीच या जगाचा पिता, माता, पालनकर्ता आणि पितामहसुद्धा आहे.' असे म्हटले आहे. तरी हे विश्वपालका, आपणच असे कठोर झाल्यावर (निदान तसे मला भासत असतां) मी काय बरे करावे?३४. 'मग हे अपराधरूपी पाप तू करतोसच का?' असे विचारशील तर ते माझ्या सहज (प्राकृतिक) दोषाने घडते आहे हे दृष्टांतासह स्पष्ट करतात. कोणी एक पक्षी 'साहस करू नये' असे म्हणत असतांनाच स्वतःच लाकूड पोखरत असतो. तद्वत्च मी माझ्या साहजिक दोषांनीच हे आपली निंदारूपी पाप करतो आहे.३५.

**आघे पुण्यवतः प्रोक्तं प्रायश्चित्तमवेक्ष्य माम् । आरात्पलायते भीत्या शार्दूलमिव शृङ्गिणी ।।३६।।**

**मालिन्यदोषभीत्या तु माषराशेः पृथक्किमु । कार्यं जपो मदङ्गाघात्किं करोति पृथग्घरे ।।३७।।**

**मादृक्पापो हरे नास्ति भवादृङ् नास्ति पापहा । पाह्यनन्याश्रयं दीनं त्यक्त्वौदासीन्यमीश माम् ।।३८।।**

पुण्यवतः आघे प्रोक्तं प्रायश्चित्तं मां अवेक्ष्य, शार्दूलं शृङ्गिणी इव आरात् पलायते।३६। मालिन्य+दोष+भीत्या तु माष+राशेः किं पृथक् कार्यम्? (हे) हरे, मत्+अङ्ग+अघात् जपः किं पृथक् करोति?।३७। (हे) हरे, मादृक् पापः न अस्ति, भवादृक् पापहा न अस्ति। औदासीन्यं त्यक्त्वा मां दीनं अन्+अन्य+आश्रयं पाहि।३८।

'अरे मग प्रायश्चित्त कर!' असे म्हणशील तर *'विध्यपराधे प्रायश्चित्तम्'* ह्या श्रौतसूत्रानुसार पुण्यवान माणसाने थोडेफार पाप केले तर त्याचा दोष परिहार करण्यासाठी ऋषिमुनींनी जे प्रायचित्त सांगितले आहे ते माझ्यासारख्या महापाप्याला पाहून, सिंहाला पाहून धावणाऱ्या गाईसारखी, लांबूनच पळून जातात.३६. जपादींनी पापाचा परिहार करायला आपण सांगाल तर मलिनतेच्या भयाने माझ्या देहांतून पाप वेगळे करणे हे उडदाच्या राशींतून काळेपणा दूर करण्यासारखे दुरापास्त आहे. जप तेथे काय करील? हे हरी अशा संबोधनाने *'नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी जन'* ह्या स्कंदपुराणांतील वचनानुसार (वैष्णवखंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३) परमेश्वराच्या नांवांत ही शक्ती आहे असेच सुचविले आहे.३७. हे हरी माझ्यासारखा पापी नाही आणि आपल्यासारखा पाप घालविणारा नाही. अशा रीतीने दुसरा कांहीही आधार नसलेल्या मला दीनाला, हे ईश्वरा, आपली उदासीनता सोडून माझे रक्षण करा.३८.

**द्रवन्त्यपि शिलाः श्रुत्वा मद्विलापं दयानिधे । कारुण्यं ते कुतो यातं म्रियमाणं न वेत्सि यत् ॥३९॥**
**एवं विलाप्य मार्गेऽसौ गुरुध्यानैकतानहृत् । तस्थौ प्रायोपवेशेन दैवात्स्वप्नस्तदाभवत् ॥४०॥**
**धेनुर्वत्सं यथोपैति भगवान्भक्तवत्सलः । प्राप्यावधूतवेषेण स्वप्नेऽमुं पर्यतोषयत् ॥४१॥**

**॥ इति श्रीगुरुचरिते चरितानुसंधानं नाम प्रथमोऽध्यायः ॥**

(हे) दयानिधे मत्+विलापं श्रुत्वा शिलाः अपि द्रवन्ति। (हे) करुणा+निधे ते कारुण्यं कुतः यातं, यत् म्रियमाणं न वेत्सि?।३९। एवं असौ मार्गे विलाप्य गुरु+ध्यान+एकतान+हृत् प्रायोपवेशनेन तस्थौ। तदा दैवात् स्वप्नः अभवत्।४०। यथा धेनुः वत्सं उपैति (तथा) भक्तवत्सलः भगवान् अवधूत+वेषेण प्राप्य अमुं स्वप्ने पर्यतोषयत्।४१।

'मी कुठे औदासीन्य धारण केले आहे?' असा प्रश्न अपेक्षून पुढे सांगतात. हे दयासागरा, हृदयशून्य अशा पाषाणांनासुद्धां पाझर फोडणारा माझा शोक ऐकूनसुद्धा आपल्यावर त्याचा कांहीच परिणाम दिसत नाही आणि मरणासन्न अशा माझ्याकडे आपण लक्ष देत नाही. आपलें कारुण्य कुठे हो गेले?३९. अशा प्रकारे हा नामधारक शोक करीत वाटेमध्ये गुरुप्राप्तीचा उपाय म्हणून अनन्य चित्ताने गुरुचिंतनांत मग्न होऊन प्रायोपवेशन करीत राहिला. *'संन्यासवत्यनशने पुमान् प्रायः'* ह्या अमरकोशांत सांगितलेल्या लक्षणाप्रमाणे (२:७:५२) सर्वसंगपरित्याग करून आमरण उपोषणाला बसला. त्या वेळी ध्याननिष्ठ असूनही चित्तांत लय म्हणजे निद्रेचा प्रादुर्भाव करणाऱ्या प्राक्तनयोगाने, जागेपणीही सत्याची प्रचीती देणारे स्वप्न झाले. मिथ्या स्वप्नदर्शनांतूनही सत्याची प्रचीती होऊं शकते याला प्रमाण म्हणून भगवत्पूज्यपादाचार्यांच्या शतश्लोकींतील (३८) वचन उद्धृत केले आहे. *'स्वाप्नादेव प्रसादादभिलषितफलं*

*सत्यतां प्रातरेति। सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति..'*.४०. नवप्रसूत गाय (भगवंताचे वात्सल्य प्रकट करणारा हा दृष्टांत आहे) जशी वासराकडे (धांवून) जाते त्याप्रमाणेच भक्तवत्सल भगवंतांनी अवधूतवेषाने स्वप्नांत येऊन ह्या नामधारकाचे समाधान केले.४१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील पहिला अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ज्ञानयोगः।

### ।। अथ द्वितीयोऽध्यायः ।।

**तत उत्थाय नालोक्य स्वप्ने दृष्टं द्विजोभितः । ध्यात्वा व्रजन्ददर्शाग्रे दयार्द्रं योगिनं समम् ।।१।।**
**अभिवाद्य स तं हर्ष-पुलकोद्गमशोभितः । प्रेमगद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे ।।२।।**
**माता पितोपदेष्टा भी-हर्ता भर्तापि मे भवान् । क्वायातोऽस्ति कुतो गन्ता दिष्ट्या मेऽद्याक्षिगोचरः ।।३।।**

तत उत्थाय द्विजः स्वप्ने दृष्टं अभितः न आलोक्य ध्यात्वा व्रजन् अग्रे दयार्द्रं समं योगिनं ददर्श।१। सः पुलक+उद्गम+शोभितः तं अभिवाद्य प्रेम+गद्गदया वाचा वक्तुं समुपचक्रमे।२। भवान् मे माता, पिता, उपदेष्टा, भी+हर्ता अपि। क्व आयातः असि? कुतो गन्ता? अद्य दिष्ट्या मे अक्षि+गोचरः।३।

**द्वितीयाध्यायी ब्रह्मोक्त गुरुशिष्यकथा । सांगे सिद्ध नामधारका भक्ति दृढ करावया ।।१।।**

तेव्हां, स्वप्नानंतर उठून, स्वप्नांत पाहिलेला तो पुरुष आतां न दिसल्याने तो ब्राह्मण त्या पुरुषाला मनांत आठवीत आसपास धुंडाळून जातां समोरच दयार्द्र शत्रुमित्रभावरहित असा स्वप्नांत पाहिलेला योगी त्याला दिसला.१. नामधारकाने त्या योगी पुरुषाला अभिवादन केले आणि आनंदाने पुलकित होऊन प्रेमाने गहिंवरलेल्या वाचेने बोलण्यास आरंभ केला.२. साधारणतः सर्वांना माता, पिता, गुरू इत्यादि उपकारकर्ते असतात. माझ्यासाठी मात्र परमानंद देणारे आपणच हे सर्व आहांत. अथवा 'आम्हांला अविद्येच्या पलीकडे तारून नेणारा तूंच आमचा पिता आहेस' या श्रुतीने (प्रश्न उ. ६.८) सांगितल्याप्रमाणे अध्यात्मज्ञान देण्यास समर्थ असे आपणच मला मातादिक आहांत. तसेच ज्ञानी पुरुष ईश्वराशी एकरूपच असल्याने *'पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः'* या गीतावचनाप्रमाणे (९:१६) आपणच सर्व विश्वाचेच मातापिता आहांत. महाराज, आपण कुठून आलां आहांत व कुठे जात आहां? (उलटसुलट अव्ययाची योजना नामधारकाच्या संभ्रमाने झाली आहे.) माझ्या सुदैवाने आज आपण माझ्या दृष्टीस पडलां आहांत.३.

**कालेऽनुकूले प्रतीपे ना स्वैः सद्भिश्च युज्यते । निःसंगस्य मुमूर्षोर्मे सर्व एवाद्य वै भवान् ।।४।।**
**नामधारकशर्माहं विप्रस्तप्तोऽत्र सद्गुरुम् । द्रष्टुकामोऽयने क्लेशान्मुमूर्षुरभवं प्रभो ।।५।।**
**इन्द्रियोच्छोषणं शोकं कोऽपि हर्तुं न मे प्रभुः । जाने त्वमेव शक्नोषि हृष्टं दृष्ट्यैव हृद्धि मे ।।६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**योगिध्येयस्त्रिमूर्त्यात्मा यद्भक्ता भुक्तिमुक्तिगाः । योऽस्ति भीमातटेऽसौ तच्छिष्यः सिद्धो धराचरः ।।७।।**

अनुकूले, प्रतीपे काले स्वैः, सद्भिः च युज्यते। मे निःसङ्गस्य मुमूर्षोः भवान् एव सर्व वै।४। (हे) प्रभो, अहं नामधारक+शर्मा विप्रः तप्तः अत्र सद्गुरुं द्रष्टु+कामः अयने क्लेशात् मुमुर्षुः अभवम्।५। मे इन्द्रिय+उच्छोषणं शोकं हर्तुं कः अपि न प्रभुः। जाने त्वं एव शक्नः असि (यतः) दृष्ट्या एव मे हृत् हृष्टं हि।६। सिद्ध उवाच। योगि+ध्येयः त्रि+मूर्ति+आत्मा यत्+भक्ताः भुक्ति+मुक्ति+गाः, यः भीमा+तटे अस्ति, असौ तत्+शिष्यः धरा+चरः सिद्धः।७।

**ना** म्हणजे पुरुषाला अर्थादिकांची अनुकूलता असतांना आपल्या सख्यासोयऱ्यांची सोबत असते. प्रतिकूल काळीं मात्र (सखेसोयरे दुरावल्याने) संतांचाच आश्रय असतो. स्त्रीपुत्रादिकांपासून वियुक्त होऊन मरणोन्मुख झालेल्या माझे खरोखर आपणच सर्व कांही आहांत.४. नामधारक नांवाचा मी ब्राह्मण आहे आणि सदुगुरूंच्या दर्शनाला निघालो असतां मार्गांत झालेल्या कष्टांनी मी मरायला टेकलो आहे. इथे शर्मा शब्दांत ब्राह्मण जातीचा उल्लेख असूनही पुन्हां विप्र शब्दाची योजना नामधारकाचे वेदाध्ययन झाले आहे हे सुचविण्यासाठी केली आहे.५. माझ्या सर्व इंद्रियांचे शोषण करणाऱ्या ह्या शोकाचा परिहार करण्यास कुणीच समर्थ नाही. आपणच ते करूं शकाल असे जाणवते; कारण आपल्या दर्शनानेच माझ्या मनाला हर्ष झाला आहे.६. सिद्धमुनी उत्तर देतात. ‘योगी ज्याचे ध्यान करतात, ज्याचे भक्त ऐहिक सुख तसेच मोक्ष पावतात अशा ह्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तिस्वरूप किंवा सत्-चित्-आनंदस्वरूप असलेल्या, भीमातीरी वास करणाऱ्या (श्रीदत्तप्रभूंचा) सिद्ध नांवाचा मी शिष्य असून ह्या पृथ्वीवर (योगबलाने अव्याहत, स्वैर गतीने) संचार करतो. तिसऱ्या श्लोकांत ‘कुठून आलांत व कुठे जातां’ असा प्रश्न विचारला त्याचे हे उत्तर आहे.’७.

**।। नामधारक उवाच ।।**

**सद्गुरुः सोऽपि भगवानस्माकं कुलदैवतम् । श्रद्धाभक्त्या भजे तं मां कष्टाब्धौ मज्जयत्यहो ।।८।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**स सद्गुरुस्त्रिमूर्त्यात्मा रुष्टेष्वन्येष्वयं प्रभुः । कोऽपि नास्मिन्लौकिकेऽपि नेष्टोऽस्यासीति भाति मे ।।९।।**

**संशयात्माऽश्रद्दधानः क्वापि कैर्नैव गोप्यते । त्रय्यात्मश्रीगुरुस्त्यक्त-संशयात्मेश्वरोऽत्र कः ।।१०।।**

नामधारक उवाच। सः सद्गुरुः भगवान् अस्माकं अपि कुल+दैवतम्। तं श्रद्धा+भक्त्या भजे। अहो कष्ट+अब्धौ मज्जयति।८। सिद्ध उवाच। सः सद्गुरुः त्रि+मूर्ति+आत्मा अन्येषु रुष्टेषु अयं प्रभुः। अस्मिन् (रुष्टे) कः अपि (प्रभुः) न, लौकिके अपि (रुष्टे कः अपि प्रभुः न।) (त्वं तस्य) इष्टः न असि इति मे भाति।९। अश्रद्दधानः संशय+आत्मा क्वः अपि कैः न एव गोप्यते। त्रयि+आत्म+श्रीगुरु+त्यक्त+संशय+आत्मा+ईश्वरः कः।१०।

तोच सद्‌गुरू भगवान् दत्त आमचे कुलदैवत आहे. अहो, श्रद्धेने व भक्तीने आम्ही त्याला भजत असूनही (तो मात्र) आम्हांला दुःखसागरांत लोटून देत आहे.८. सिद्धमुनी म्हणतात, अन्य कोणा ब्रह्मादिकांचा रोष झाला असतां हा त्रयमूर्ति सद्‌गुरू आपल्या भक्तांचे रक्षण करण्यास समर्थ आहे. परंतु ह्यांचाच नव्हे तर अगदी लौकिक गुरूंचाही रोष झाला तर कुणीच रक्षण करूं शकत नाही. मला वाटते तू ह्या सद्‌गुरूंच्या कृपेला पात्र नसावास.९. हा आत्मा स्थूलदेहरूप आहे, की सूक्ष्मदेहरूप अथवा ह्या दोन्हीहून वेगळा? वेगळा असेल तर अणूच्या आकाराचा आहे की मध्यम आकाराचा आहे की सर्वगत आहे? जड आहे, द्रव्यबोधात्मक आहे की चिद्रूप आहे? हा ईश्वरच आहे की ईश्वराहून भिन्न आहे? प्रपंच सत्य आहे की मिथ्या? मोक्षाचे साधन कर्म आहे, की योग आहे की ज्ञान आहे? अशा बुद्धिजन्य, संसर्गजन्य आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनाने उत्पन्न झालेले संशय ज्याच्या चित्तांत घर करून राहिलेले आहेत. त्यांतही वेदांतवाक्यावर श्रद्धा नसलेल्या संशयग्रस्त पुरुषाचे रक्षण कुणीही कुठेही करूं शकणार नाही. त्रिमूर्त्यात्मक सद्‌गुरूंनी टाकलेल्या ह्या संशयात्म्यावर कोण अनुग्रह करील? अर्थात् कुणीच नाही.१०.

### ।। नामधारक उवाच ।।

**रुष्टेऽपि लौकिके नेशःकोऽपीत्युक्तं वदस्व चेत् । प्राग्वृत्तं चैष त्र्यात्मा कथं मे छिन्धि संशयम् ।।११।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**पुरा निराशिषोऽप्येको बहुस्यामित्यभून्मतिः । या योगनिद्रितस्यैषा विष्णोर्मायाऽनया जगत् ।।१२।।**
**सृष्टं प्राङ्नाभिकमलादभवच्चतुराननः । ददौ तस्मै विनीताय वेदांस्तैरसृजज्जगत् ।।१३।।**

नामधारक उवाच। लौकिके अपि रुष्टे न कः अपि ईशः इति उक्तम्। प्राक्+वृत्तं चेत् वदस्व। कथं त्रयि+आत्मा च। संशयं छिन्धि।११। सिद्ध उवाच। पुरा निः+आशिषः एकः अपि योग+निद्रितस्य विष्णोः या मतिः अभूत् एषा माया। अनया जगत् सृष्टम्। प्राक् नाभि+कमलात् चतुः+आननः अभवत्। तस्मै विनीताय (विष्णुः) वेदान् ददौ। (सः) तैः जगत् असृजत्।१२-१३।

नामधारक विचारतो. महाराज! 'लौकिक गुरूचाही जर रोष झाला तरीही त्यापासून सोडवणारा कुणी नाही' असे जे आपण बोललांत त्याचा कांही पूर्वेतिहास असला तर सांगावा. तसेच हा दत्त त्रयमूर्ति कसा आहे हा माझा संशयही आपण फेडावा.११. सिद्धमुनी उत्तर देतात. पूर्वी - म्हणजे नैमित्तिक कल्पाच्या काळी, निरिच्छ अशा परमात्म्याला आपण एकच आहो ते बहुरूप व्हावे अशी बुद्धी झाली. ते का? या प्रश्नाचे उत्तर देतात की नैमित्तिक प्रलयाच्या वेळी सर्व प्रणिमात्रांच्या वासना परमेश्वराच्या ठायीं लीन झाल्या तीच योगनिद्रा. ह्या योगनिद्रा धारण केलेल्या व्यापनशील परमात्म्याला त्या सर्व प्राणिमात्रांच्या फलोन्मुख झालेल्या कर्मांमुळे आपण अनेक रूपे घ्यावीत अशी मतिरूप इच्छा झाली (ऋग्वेद १०:१२९:३-४). इच्छा, ज्ञान आणि क्रिया शक्तिरूप अशा ह्या विष्णूची ही मिथ्यारूप असली तरीही कार्यावरून तिचे अनुमान करतां येते. अशा मिथ्या असूनही भावरूप (सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय) म्हणविलेली माया भगवंताच्या दृष्टिमात्राने उद्दीपित झाली आणि ती सचेतन झाल्यासारखी भासली. तिच्या द्वारे जगताची उत्पत्ति केली. (पुढच्या श्लोकांतील **सृष्टं** हा शब्द जोडून.) वास्तविक उत्पत्ति-स्थिति-लय ही मायेची कार्ये असूनही विष्णुस्वरूप ब्रह्माला कल्पनेने दिलेले कारणत्व आहे. *'जन्माद्यस्य यतोऽन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (१:१:२) हे ब्रह्माचे तटस्थलक्षण आहे.११.

**कृतं त्रेतां द्वापरं च सधर्मं व्यसृजत्कलिम् । वर्णाश्रमविभागेन मनुष्यस्थितिहेतवे ॥१४॥**
**वैराग्यज्ञानवान्सत्यः सत्यवाग्यज्ञसूत्रभृत् । यज्ञसंभारधृक्त्रेता द्वापरस्तु सुशस्त्रभृत् ॥१५॥**
**पुण्यपापोग्रताशान्ति-दयानैष्ठुर्यसंयुतः । कलिस्तु लिङ्गजिह्वाभृत्कच्चरोऽसन्पिशाचवत् ॥१६॥**

(सः) मनुष्य+स्थिति+हेतवे वर्ण+आश्रम+विभागेन कृतं, त्रेतां, द्वापरं च कलिं स+धर्मं व्यसृजत्।१४। सत्यः वैराग्य+ज्ञानवान् सत्य+वाक् यज्ञ+सूत्र+भृत्। त्रेता यज्ञ+संभार+धृक्, द्वापरः तु सु+शस्त्र+भृत् पुण्य+पाप+उग्रता+शान्ति+दया+नैष्ठुर्य+संयुतः। कलिः तु लिङ्ग+जिह्वा+भृत् कच्चरः असन् पिशाचवत्।१५-१६।

मग सृष्टीची प्रक्रिया सांगतात. प्रथम (श्रीविष्णूंच्या) नाभिकमलांतून चतुर्मुख ब्रह्मदेवांचा उद्‌भव झाला. विनीत अशा त्या ब्रह्मदेवाला (भगवंतांनी) वेद दिले. (ब्रह्मदेवांनी) त्या वेदांच्या आधारे *'धाता यथापूर्वमकल्पयत्'* या श्रुतिवचनानुसार (ऋग्वेद १०:१९०:३) जगताची निर्मिति केली. भगवंतांनी त्याला वेद दिले यावरून हे स्पष्ट होते की *'शास्त्रयोनित्वात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:१:३) प्रतिपादिल्याप्रमाणे अनादि विष्णूच वेदांचे कर्ते आहेत. इतर कुणी अर्वाचीन नव्हेत.१२. वैराग्य, ध्यान इत्यादि धर्मांनी युक्त कृतयुग, यजनादिधर्मांनी युक्त त्रेतायुग, अर्चनादि धर्माने युक्त द्वापार आणि कीर्तनधर्माने युक्त कलि अशा चार युगांची उत्पत्ती करून मानवाच्या उत्कर्षासाठी ब्राह्मण, क्षत्रिय, वैय आणि शूद्र अशा चार वर्णांची तसेच ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांची विभागणी केली.१४. सत्य(कृत)युग वैराग्य आणि ज्ञान यांनी युक्त, सत्यभाषी आणि यज्ञोपवीत धारण करणारे आहे. म्हणजेच त्या युगांतील प्रजेत हे गुण होते. त्याचप्रमाणे त्रेतायुग यज्ञसामग्री धारण करणारे तर द्वापारयुग शस्त्रास्त्रांनी सज्ज असे केले.१५. (कृतयुगांत चतुष्पाद असलेल्या धर्माचा) एक एक पाद त्रेतादि युगांत क्रमाने कमी होऊन द्वापारांत द्विपाद झाल्याने पाप व पुण्य, उग्रता व शांती तसेच दया व निष्ठुरता यांचे मिश्रण असते. तर कलियुगांत धर्माचा एकच पाय राहतो. **'तु'** शब्दाने कलियुगाचे वेगळेपण सूचित केले आहे. त्याने एका हाताने जिह्वा आणि दुसऱ्या हाताने लिंग धरले आहे. म्हणजेच या युगांतील लोक जिभेचे चोचले पुरविणारे आणि कामपर असतील. कलियुग मळकट, असाधु आणि पिशाचासारखे वेडेवांकडे चाळे करणारे आहे.१६.

**एकैकं यतकालं कौ प्रेरयद्विश्वहेतवे । प्रयाणकाले कलये प्रोक्तां गुरुकथां शृणु ।।१७।।**

**।। कलिरुवाच ।।**

**कथं यास्ये वृषपर-प्रशान्तजनसेविताम् । भुवं श्रुत्वापि मे चेतः खिद्यतेऽङ्गं च तप्यते ।।१८।।**
**छेत्ताहं धर्मसेतोः शुक्कलहद्वेषतापकृत्। भ्रातान्यस्त्रीस्वहर्ता मे षड्-द्विड्भाक्प्राणवल्लभः ।।१९।।**
**क्षतव्रतोऽपि मे प्राणो नास्तिकोऽधार्मिकोऽपि मे । ये स्थिता भारते वर्षे धार्मिकास्ते ममारयः ।।२०।।**

कलिः उवाच। वृषपर+प्रशांत+जन+सेवितां भुवं कथं यास्ये? श्रुत्वा अपि मे चेतः खिद्यते, अङ्गं च तप्यते।१८। अहं धर्म+सेतोः छेत्ता, शुक्+कलह+द्वेष+ताप+कृत्। भ्राता+अन्य+स्त्री+हर्ता षड्+द्विड्+भाक् मे प्राण+वल्लभः।१९। क्षत+व्रतः अपि मे प्राणः, नास्तिकः अधार्मिकः अपि। ये भारते वर्षे स्थिताः धार्मिकाः ते मम अरयः।२०।

प्रत्येक युगाला त्याचा कालावधि नेमून जगताच्या स्थैर्यासाठी भूमीवर पाठविले. कृताचा कालावधि सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षे, त्रेतायुगाचा बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षे, द्वापाराचा आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षे तर कलीचा चार लक्ष बत्तीस हजार वर्षे असा आहे. कलियुगाला (भूमीवर) पाठवितांना (ब्रह्मदेवाने) सांगितलेली गुरुकथा तूं ऐक.१७. ब्रह्मदेवाने पृथ्वीवर जाण्याची आज्ञा केल्यावर धर्माला घाबरून कली म्हणतो, ‘धर्मपर प्रशांत असे लोक ज्या भूमीवर राहतात तिथे मी कसा जाऊं? त्या भूमीची वार्ता ऐकूनसुद्धा माझे मन खिन्न होते आणि माझ्या अंगाचा दाह होतो.’१८. ‘मी धर्ममर्यादेचा उच्छेद करणारा आहे. शोक, कलह, द्वेष आणि ताप करणारा आहे. परधन व परस्त्री यांचा अपहार करणारे मला भावासारखे प्रिय आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांचे दास माझे प्राणसखे आहेत.’१९. ‘व्रत, नेम सोडून देणारे, नास्तिक (परलोक नाहीच असे मानणारे) आणि अधर्मरत (धर्मविरुद्ध आचरण करणारे) जणूं माझे प्राणच आहेत. भारतवर्षांत राहणारे धार्मिक माझे वैरी आहेतच कारण त्यांचा मला ताप होतो.’२०.

**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरेक्षणात् । बहिर्यान्त्यसवो मेऽपि योगिज्ञानीक्षणात्क्षणात् ।।२१।।**

**।। ब्रह्मोवाच ।।**

**आसुर्या संपदा गच्छ वशा लोका भवन्ति ते । शतायुर्हि नरः कोऽपि धन्यो भूयान्न तं जहि ।।२२।।**
**गुर्वीशदेवसद्विप्र-पितृधर्मपरो नरः । त्वद्दोषैर्लिप्यते नैव गुरुभक्तो विशेषतः ।।२३।।**
**नाम्बुनाब्जदलं यद्वल्लिप्यतेऽघैर्गुरुप्रियः । नैव जेतुं गुरोर्भक्तं देवा अपि न शक्नुयुः ।।२४।।**

गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपर ईक्षणात्, योगि+ज्ञानी+ईक्षणात् क्षणात् मे असवः बहिः यान्ति।२१। ब्रह्मा उवाच। आसुर्या संपदा गच्छ, लोकाः ते वशाः भवन्ति। नरः शत+आयुः। कः अपि धन्यः भूयात्। तं न जहि।२२। गुरु+ईश+देव+सत्+विप्र+पितृ+धर्मपरः नरः त्वत्+दोषैः न लिप्यते। विशेषतः गुरु+भक्तः न एव।२३। यत्+वत् अम्बुना अब्ज+दलं अघैः गुरु+प्रियः न लिप्यते। देवाः अपि गुरुभक्तं जेतुं न शक्नुयुः।२४।

'गुरु, ईश्वर, सात्त्विक ब्राह्मण आणि मातापितरांची सेवा करणाऱ्यांना (केवळ) पाहिल्यानेही माझे प्राण कंठाशी येतात. तसेच योगी, ज्ञानी यांच्या दर्शनाने मी क्षणांत मरायला टेकतो.'२१. ब्रह्मदेव त्याला धीर देतात, 'दंभ, दर्प, अभिमान, क्रोध आणि पारुष्य (कठोर वचन) ही आसुरी संपदा (भ.गी.१६:४) तुझ्याबरोबर पाठवीत आहे. त्यांना घेऊन जा म्हणजे लोक तुला वश होतील. माणसाचे आयुष्य केवळ शंभर वर्षेच असेल; एखादाच पुण्यवान् होईल. त्याचा घात करू नको.'२२. गुरू, ईश्वर, देव व ब्राह्मण यांची सेवा करणाऱ्यांना, विशेषतः गुरुभक्तांना तुझा दोष कधीच लागणार नाही.'२३. 'ज्याप्रमाणे कमलाच्या पानाला पाणी चिकटत नाही (छांदोग्योपनिषत् ४:१४:३) त्याप्रमाणे श्रीगुरुकृपापात्र शिष्याला पाप स्पर्शूं शकत नाही. गुरूच्या भक्ताला देवादिकसुद्धां जिंकूं शकत नाहीत, त्याला विघ्न करूं शकत नाहीत; मग इतरांची काय कथा?'२४.

## ।। कलिरुवाच ।।

**गुरुर्वरोऽमरेभ्योऽपि कथं वद हि यत्प्रियः । केनाप्यजेय इत्येतत्प्राग्वृत्तं क्वापि चेद्वद ।।२५।।**

## ।। ब्रह्मोवाच ।।

**ज्ञानं गुरुं विना न स्याद्यस्य कस्यापि निर्जराः । गुरुभक्त्यैव सिद्धार्थाः स्युस्ततोऽप्यधिको गुरुः ।।२६।।**

कलिः उवाच। यत् प्रियः केन अपि अजेयः (सः गुरुः) अमरेभ्यः अपि वरः कथं, वद। इति एतत् क्व अपि प्राक् वृत्तं चेत् वद।२५।
ब्रह्मा उवाच। यस्य कस्य अपि गुरुं विना ज्ञानं न स्यात्। निर्जराः अपि गुरुभक्त्या एव सिद्ध+अर्थाःस्युः। ततः अपि अधिकः गुरुः।२६।

कलि प्रश्न करतो, 'गुरू देवापेक्षांही इतके श्रेष्ठ कसे ज्यायोगे त्यांचे भक्तही अजिंक्य होतात? याविषयी कांही पूर्वेतिहास असल्यास सांगा.'२५. **देवतांना संसार आहे का?** ब्रह्मदेव कलीला सांगतात, 'गुरूशिवाय ज्ञान कुणालाही होत नाही. इंद्र, अश्विनीकुमार आदि देवही प्रजापति, दध्यङ्मुख इत्यादि गुरूंची भक्ती करूनच मोक्ष पावले. त्यामुळे त्यांच्यापेक्षां गुरू अधिक श्रेष्ठ आहेत.' 'स्वर्गस्थ इंद्रादि देवतांना कुठला संसार? आणि संसारच नसेल तर मोक्ष कशापासून?' ह्या शंकेचे समाधान असे आहे की श्रुतिवचनानुसार (ऐतरेय उ. १:२:१) त्या देवताही भूक-तहान इत्यादि स्वरूपाच्या संसारसागरांत पडतात; आणि त्यांतून मुक्त होण्यासाठी गुरूपसत्ति (सद्‌गुरूंना शरण जाणे) हाच उपाय सांगितला आहे. *'आचार्यवान् पुरुषो वेद'* (छां.उ. ६:१४:२) *'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ'* (कठ उ. १:२:९). तर मग मनुष्यांना तर यज्ञादि कर्माच्या अनुष्ठानाने चित्तशुद्धि होऊन मग मोक्ष मिळतो. देवांनी कर्मांद्वारे कुणाचे अनुष्ठान करायचे? मग चित्तशुद्धी कशी होईल? असे म्हणाल तर देवांना स्वभावतःच वेदांचे ज्ञान असल्याने मनुष्याप्रमाणे वेदाध्ययनासाठी उपनयनादि संस्कारांची त्यांना आवश्यकता नाही. तसेच त्यांचे अंतःकरण स्वभावतः शुद्ध असल्याने त्यांना यज्ञादि कर्मांचीही आवश्यकता नाही. ज्यांचे (मानवांचे) चित्त अशुद्ध असते त्यांना चित्तशुद्धी होऊन विविदिषा (वैराग्य) उत्पन्न होण्यासाठी कर्मकांडाद्वारे देवतांचे यजन करण्याची आवश्यकता असते.

**पुरा गोदावरीतीरे वेदधर्मैकदा मुनिः । बहुशिष्यप्रशिष्यस्तन्निष्ठां ज्ञातुमिदं जगौ ।।२७।।**
**तपसा क्षालितं पापं बहु प्रारब्धमस्ति मे । तद्भोग्यं व्याधिरूपेण काश्यां कस्तत्र रक्षकः ।।२८।।**

पुरा गोदावरी+तीरे एकदा वेदर्धमा बहु+शिष्य+प्रशिष्यः मुनिः तत् निष्ठां ज्ञातुं इदं जगौ।२७। तपसा पापं क्षालितं मे बहु प्रारब्धं अस्ति। ते व्याधि+रूपेण काश्यां भोग्यम्। तत्र कः रक्षकः अस्ति?२८।

*'तदुपरि बादरायणः संभवात्'* या ब्रह्मसूत्रांत (१:३:२६) सांगितले आहे की मनुष्याच्या वर असणाऱ्या स्वर्गादिक लोकांतील देवतांनाही ज्ञानाचा अधिकार आहे असे बादरायणांचे मत आहे. उदाहरणार्थ, इंद्राने ब्रह्मचर्य धारण करून चार वेळां प्रजापतीला गुरू करून ज्ञान प्राप्त केले. तसेच अश्विनीकुमारांनी दध्यंचांना गुरू करून मधुब्राह्मण विद्या मिळविली. त्यावरून देवही गुरूची उपासना करून कृतार्थ झाले. अशा रीतीने गुरू त्यांच्याहून श्रेष्ठ आहेत.२६.

**प्रारब्ध भोगानेच संपवावे -** इथे एक पूर्वीचा इतिहास सांगतात. पूर्वी गोदावरीतीरावर वेदधर्मा मुनि रहात. त्यांना खूपसे शिष्य आणि प्रशिष्य होते. एकदा त्यांची श्रद्धा जाणण्यासाठी (त्यांच्या श्रद्धेची परीक्षा घेण्यासाठी) वेदधर्मा त्यांना म्हणाले.२७. 'धर्माने पापाचा नाश होतो' (महानारायणोपनिषत् १६:६), 'तपाने पापाचा नाश करतात' (मनुस्मृति १२:१०४) ह्या वचनांनुसार मी तपाने बरेच पाप धुवून टाकले आहे. तरी अजूनही माझे प्रारब्ध उरलेले आहे. ते व्याधिरूपाने मला काशीक्षेत्रांत राहून भोगायचे आहे. प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय होतो. ते पापरूप कर्म विविध आधी ज्यांत अंतर्भूत आहेत अशा व्याधीद्वारा मला भोगावे लागेल. किंवा (मुनींच्या मनोभूमिकेच्या संदर्भांत) असाही अर्थ करतां येईल की शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी असा दुःखद कर्मभोग आधीरहित (विवेकाने अनुद्विग्न मनाने) भोगायचा. त्या काशीत तुमच्यापैकी कोण माझे रक्षण करील?२८.

**गलत्कुष्ठाभिभूतस्य मम दंशादिवारणैः । क्षालनैरन्नदानैश्च प्रेम्णा कस्तत्र रक्षकः ।।२९।।**
**इति तस्य वचः श्रुत्वा तूष्णीं तस्थुर्भियाखिलाः । तत्रैको दीपको नाम शिष्य ऊचेऽभिवाद्य तम् ।।३०।।**
**न शेषयेद्दोषशेषं मोक्षविघ्नं भवत्कृतम् । ममात्मनैव भोक्ष्येऽहमनुज्ञां दातुमर्हसि ।।३१।।**

**।। गुरुरुवाच ।।**

**भोक्तव्यं स्वयमेवाघं नान्यद्वारेण तत्क्षयः । अतः कष्टेन तद्भोक्ष्ये काश्यां शक्तोऽसि चेदव ।।३२।।**

गलत्+कुष्ठ+अभिभूतस्य मम प्रेम्णा दंश+आदि+वारणैः, क्षालनैः अन्न+दानैः च कः तत्र रक्षकः?।२९। इति तस्य वचः श्रुत्वा अखिलाः भिया तूष्णीं तस्थुः। तत्र दीपकः नाम एकः शिष्यः तं अभिवाद्य ऊचे।३०। 'भवत्+कृतं मोक्ष+विघ्नं दोष+शेषं न शेषयेत्। अहं मम आत्मना एव भोक्ष्ये। अनुज्ञां दातुं अर्हसि'।३१। गुरुः उवाच। अघं स्वयं एव भोक्तव्यम्। अन्य+द्वारेण तत् क्षयः न। अतः तत् कष्टेन काश्यां भोक्ष्ये। (त्वं) शक्तः असि चेत् अव।३२।

तुम्ही सगळेच 'आम्ही करू' असे म्हणाल तर (नीट लक्ष देऊन) ऐका. पू आणि रक्त वाहणाऱ्या कुष्ठाच्या व्रणांनी व्यापलेल्या माझ्या माशा आणि किडांना निवारून, धुवून, मला अन्न भरवून, प्रेमपूर्वक तिथे माझा सांभाळ कोण करील?२९. हे त्यांचे बोलणे ऐकून सर्वजण भीतीने गप्प राहिले. एवढी अवघड जोखीम पत्करतां येत नाही आणि नाही म्हणावे तर गुरूंचा शाप होईल. तिथे एक दीपक नांवाचा शिष्य त्यांना (गुरूंना) वंदन करून म्हणाला.३०. 'दोषाचा अंशही बाकी ठेवूं नये कारण तो मोक्षाला विघ्न करतो. आपले दुष्कृत मी माझ्या देहानेच भोगून टाकतो. आपण मला आज्ञा करावी.'३१. गुरु म्हणतात 'आपले पाप आपणच भोगावे. दुसऱ्याकरवी त्याचा क्षय होत नाही. गरुडपुराणांत म्हटले आहे, 'जीव एकटाच जन्माला येते आणि एकटाच मरण पावतो. एकटाच पुण्याचा भोग घेतो आणि एकट्यानेच पापही भोगावे लागते.' (प्रेतकल्पखंड, धर्मकांड १२:२३-२४). त्यासाठी मी हे कर्म कष्टाने काशीत भोगणार आहे. तुझी शक्ती असेल तर मला सांभाळ.'३२.

**इत्युक्तं गुरुणाश्रुत्य काशीं तेन समं ययौ । कुष्ठी भूत्वापि सोऽन्धोऽघं बुभुजे भेज एष तम् ।।३३।।**
**गुरुर्गलद्व्रणत्रस्तः कार्याकार्याज्ञ एव सन् । प्रतीपाचरणैः शिष्यं शश्वद्व्यर्थं व्यताडयत् ।।३४।।**
**स सेवावसरे भिक्षां सेवां भिक्षाक्षणेऽपि तम् । ययाचेऽहनदप्राप्तौ नाखिद्यत सदाप्यसौ ।।३५।।**
**दत्तां याचितकां भिक्षां मुनिस्तद्दोषकीर्तनात् । भूमौ प्रक्षिप्य रुष्टोऽन्नं स्वाद्वानीहीत्युवाच तम् ।।३६।।**

इति गुरुणा उक्तं आश्रुत्य (दीपकः) तेन समं काशीं ययौ। सः अपि कुष्ठी अंधः भूत्वा अघं बुभुजे। एष तम् भेजे।३३। गुरुः गलत्+व्रण+त्रस्तः कार्य+अकार्य+अज्ञ एव सन् प्रतीप+आचरणैः शिष्यं व्यर्थं व्यताडयत्।३४। सः तं सेवा+अवसरे भिक्षां भिक्षा+क्षणे सेवां अपि ययाचे। अप्राप्तौ अहनत्। असौ सदा अपि न अखिद्यत।३५। मुनिः याचितकां भिक्षां दत्तां तत् दोष+कीर्तनात् भूमौ प्रक्षिप्य रुष्टः 'वादु अन्नं आनीहि' इति तं उवाच।३६।

हे गुरूंचे वचन अंगीकारून (दीपक) त्यांच्यासह काशीला गेला. *'या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरेतसां। सा गतिः सर्वजन्तूनां गौतमीतीरवासिनां।। रेवातीरे तपः कुर्यान्मरणं जाह्नवीतटे। दानं दद्यात्कुरुक्षेत्रे तत्त्रयं गौतमीतटे।।'* (गौतमीमाहात्म्य) असे गोदावरीचे माहात्म्य असले तरी काशीक्षेत्राचा प्रभाव दर्शविण्यासाठी वेदधर्मा मुनि गोदावरीपासून काशीला गेले. तसेच कुष्ठादि रोगांचा स्वीकार केला. पुढे ५९व्या श्लोकांत हे स्पष्ट केले आहे. अशा रीतीने भोग भोगणाऱ्या आंधळ्या किंवा कुष्ठी गुरूची तो शिष्य सेवा करूं लागला.३३. वाहत्या व्रणांनी त्रासलेल्या गुरूंना योग्य अयोग्याचा विवेक राहिला नाही; आणि ते वेडेवाकडे वागून शिष्याला विनाकरणच मारूही लागले.३४. ते भिक्षेच्या वेळी सेवेची आणि सेवेच्या वेळी भिक्षेची मागणी करीत. लगेच न मिळाल्यास त्याला (शिष्याला) मारीत. तरीही तो खिन्न होत नसे. (प्रसन्नचित्ताने सेवा करीत असे.)३५. मागून आणलेली भिक्षा खातानाही, '(ते अन्न) थंड आहे, रुचकर नाही' अशी नावे ठेवीत रागाने जमिनीवर टाकून त्याला गोड अन्न आणायला सांगत.३६.

**भिक्षार्थमपि गच्छन्तं निवर्त्योचे कृता न मे । विण्मूत्रोत्सर्गसंशुद्धिः क्व यास्यश्नन्ति मक्षिकाः ।।३७।।**
**यथोक्तं कर्तुमुद्युक्तं निवार्योचे न वेत्सि माम् । क्षुधा कण्ठगतप्राणं देह्यन्नं पाप मे द्रुतम् ।।३८।।**
**भुक्त्वा याचितकान्नं स कदाचित्तात पुत्रक । श्रान्तोऽसि मे स्वपेत्युक्त्वा सुप्तेऽस्मिन्क्षुधितोऽब्रवीत् ।।३९।।**

भिक्षार्थं गच्छन्तं अपि निवर्त्य ऊचे, 'क्व यास्यसि? मे विट्+मूत्र+उत्सर्ग+संशुद्धिः न कृता। मक्षिकाः अश्नन्ति'।३७। यथा उक्तं कर्तुं उद्युक्तं निवार्य ऊचे, 'मां क्षुधा कण्ठ+गत+प्राणं न वेत्सि? पाप! द्रुतं मे अन्नं देहि'।३८। कदाचित् याचितक+अन्नं भुक्त्वा सः '(हे) तात, पुत्रक, श्रान्तः असि, स्वप,' इति उक्त्वा अस्मिन् सुप्ते 'क्षुधितः' अब्रवीत्।३९।

भिक्षेसाठी निघालेल्या शिष्याला थांबवून 'अरे! कुठे जातोस? माझ्या विष्ठा-मूत्रविसर्जनाची (तसेच जखमांतून वाहणाऱ्या पू, रक्त यांची) स्वच्छता केली नाहीस. या माशा मला चावताहेत,' असे बोलत.३७. त्यांच्या सांगण्यानुसार करायला गेल्यास 'अरे पाप्या! भुकेने माझे प्राण गळ्याशी आलेले तुला कळत नाहीत का? मला लवकर अन्न दे,' असे म्हणून त्याला अडवत. *'अन्नायुर्वा एष यद्वायुः'* या वचनानुसार (ऐ.उ. १:३:१०) अन्न हे प्राणाला शरीराशी जोडणारे बंधन असल्याने जीवनाचे कारण आहे. यासाठीच वाजसनेयांनी अन्नाला प्राणाला बांधून ठेवणारी दोरी (दाम) (बृ.उ. २:२:१) असा विचार मांडून अन्नाच्या अभावाने प्राण देठापासून वेगळ्या झालेल्या फळासारखा शरीरांतून सुटून जातो असे म्हटले आहे (बृ.उ. ४:३:३६). त्यानुसार वेदधर्मा 'मला अगतिकाला जर भुकेने मरण आले तर ती हत्या तुला लागेल.' म्हणून त्याला 'पाप्या!' असे संबोधन केले आहे.३८. कधी कधी शिष्याने मागून अणलेले अन्न खाऊन गुरूंनी म्हणावे, 'बाबा रे! माझं करून थकला असशील बाळा! झोप.' त्यावर तो शिष्य झोपतो न झोपतो तोंच 'अरे मला भूक लागलीय्,' असे म्हणावे. शिष्याला तात म्हटले आहे. 'तनोति' म्हणजे वंश वाढवतो तो 'तात'. शिष्य स्वतःच्या शिष्यप्रशिष्यांद्वारे गुरुपरंपरेचा विस्तार करतो. या अर्थाने हे संबोधन यथार्थच आहे.३९.

**एवं संछलितोप्येष भेजेऽखेदोऽनिशं गुरुम् । विस्मृतस्वात्मयात्रोऽपि मत्त्वा सर्वामरेश्वरम् ।।४०।।**
**गाङ्गाम्भो गुरुपादाम्भः साक्षाद्विश्वेश्वरं गुरुम् । सर्वानन्दनिधिं बुद्ध्वा मनो न क्वाप्यचोदयत् ।।४१।।**
**गुरुभक्तिसुपूतोऽभूज्ज्ञात्वा विश्वेश्वरोऽप्यमुम् । प्राप्योचे वरदोऽस्मीष्टं वरं वरय तेऽस्तु शम् ।।४२।।**
**दीपकोऽप्याह किं कार्यं वरेण गुरवस्तु मे । रुक्शान्त्यै वरमिच्छन्ति यदि पृष्ट्वा वृणोमि तत् ।।४३।।**

एवं संछलितः अपि एष अखेदः अनिशं विस्मृत+स्व+आत्म+यात्रः अपि गुरुं सर्व+अमर+ईश्वरं मत्वा भेजे।४०। गुरु+पाद+अम्भः गाङ्ग+अम्भः, गुरुं साक्षात् विश्वेश्वरं सर्व+आनन्द+निधिं बुद्ध्वा मनः क्व अपि न चोदयत्।४१। विश्वेश्वरः अपि अमुं गुरु+भक्ति+सुपूतः अभूत् ज्ञात्वा प्राप्य ऊचे, 'वरदः अस्मि। वरं वरय। ते शं अस्तु!'।४२। दीपकः अपि आह। वरेण मे किं कर्यिम्? यदि गुरवः रुक्+शान्त्यै वरं इच्छन्ति (तं) पृष्ट्वा तत् वृणोमि।४३।

अशा रीतीने छळ करूनही हा शिष्य मात्र रात्रंदिवस न कंटाळता गुरूंनाच सर्वदेवेश्वर मानून त्यांची सेवा आपल्या देहाची पर्वा न करतां करीत होता.४०. गुरूच साक्षात् विश्वेश्वर आहेत, गुरूंचे चरणतीर्थ हेच गंगाजल आणि गुरूच सर्व सुखाचे आगर आहेत असे जाणून (त्या शिष्याने) आपले मन इतर कोणत्याही देवतांकडे जाऊं दिले नाही. इतर कुठल्याही दैवताच्या दर्शनादीचा संकल्पही मनांत येऊं दिला नाही.४१. हा दीपक गुरुभक्तीच्या योगाने अत्यंत पवित्र (शुद्धचित्त) झाला आहे असे जाणून भगवान् विश्वेश्वर त्याच्याकडे येऊन म्हणाले, 'मी (प्रसन्न होऊन) वर देत आहे. तू वर मागून घे. तुझे कल्याण असो.' दुःखाचा क्षय करणारे (*'श्यति'*) ते 'शं' म्हणजे कल्याण.४२. दीपक म्हणाला 'मला वर काय करायचा? माझ्या गुरूंना रोगाच्या शमनासाठी वर हवा असल्यास त्यांना (ते सध्यां इथेच असल्याने) विचारतो. त्यांची इच्छा असेल तर तो वर मी घेईन.'४३.

**इत्युक्त्वैत्य शशंसास्मै गुरुस्तप्तोऽब्रवीत्स तम् । भोगादेव क्षयं नेष्ये सेवायां मे बिभेष्यपि ।।४४।।**
**तच्छ्रुत्वा स तथेत्युक्त्वा शिवमेत्याब्रवीद्वरम् । न गुर्वसंमतं काङ्क्षे तच्छ्रुत्वागात्स दुर्मनाः ।।४५।।**
**निर्वाणमण्डपं गत्वा प्राह विष्णुमुखामरान् । चण्डो मुनिर्वेदधर्मा रुग्णस्तच्छिष्य उत्तमः ।।४६।।**
**गुरुभक्तः कम्बलाश्वतरासन्नोऽस्ति दीपकः । वरं दातुमगां प्रेम्णा नाददे स गुरूद्यतः ।।४७।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तं द्रष्टुकामो हरिर्ययौ । विष्णुर्दीपकमाहाङ्ग वरदोऽस्मि वरं वृणु ।।४८।।**

इति उक्त्वा अस्मै एत्य शशंस। गुरुः तप्तः, तं अब्रवीत्। भोगात् एव क्षयं नेष्ये। मे सेवायां बिभेषि अपि?।४४। तत् श्रुत्वा स 'तथा' इति उक्त्वा शिवं एत्य अब्रवीत्, 'गुरु+असंमतं वरं न काङ्क्षे'। तत् श्रुत्वा सः दुर्मनाः अगात्।४५। निर्वाण+मण्डपं गत्वा विष्णु+मुखान् अमरान् प्राह। चण्डः रुग्णः मुनिः वेदधर्मा तत् शिष्यः कम्बल+अश्वतर+आसन्नः दीपकः अस्ति। प्रेम्णा वरं दातुं अगात्। सः गुरु+उद्यतः न आददे।४७। इति ईश+वाक्यं श्रुत्वा हरिः तं द्रष्टुकामः ययौ। विष्णुः दीपकं आह, '(हे) अङ्ग, वरदः अस्मि, वरं वृणु।४८।

असे (विश्वेश्वरांना) बोलून (दीपकाने) गुरूंकडे येऊन त्यांना हे वृत्त सांगितले. (आपल्या रोगनिवारणासाठी वर मागून घेऊं का असे विचारले.) तेव्हां गुरू संतापून म्हणाले, 'माझे प्रारब्धकर्म मी भोगूनच संपवीन. माझ्या सेवेला भितोस (उबगलास) काय?'.४४. ते (सद्गुरूंचे वचन) ऐकून 'तसे (ईश्वराला सांगतो)' असे म्हणून शंकरांकडे येऊन 'गुरूंना मान्य नसलेला (आपला) वर मला नको' असे सांगितले. हे ऐकून आपल्या वराच्या अनादराने हिरमुसलेले ते भगवान शंकर निघून गेले.४५. निर्वाणमंडपांत येऊन शंकरांनी विष्णुप्रमुख सर्व देवांना सांगितले की, 'वेदधर्मा नांवाचा अत्यंत कोपी मुनि व्याधिग्रस्त झाला आहे. त्याचा उत्तम शिष्य-.४६. गुरुभक्त दीपक कंबलाश्वतराजवळ गुरूंची सेवा करीत आहे. त्याला (त्याच्या तीव्र गुरुभक्तीने) प्रसन्न होऊन वर देण्यासाठी मी गेलो असतां तो गुरूंच्या सेवेत निमग्न असलेला शिष्य वर घेत नाही.'४७. हे ईश्वराचे वाक्य ऐकून श्रीहरि विष्णु दीपकाकडे जाऊन म्हणाले, 'प्रिय दीपका, मी वर द्यायला आलो आहे. तू वर मागून घे.'४८.

**तपसाष्टाङ्गयोगैश्च सूपायैर्मननादिभिः । उपवासैर्व्रतैर्योगैर्धर्मैर्गम्योऽस्मि नो नृणाम् ।।४९।।**
**गुरुसद्विप्रभक्तस्य मन्मयाभ्यन्तरात्मनः । निर्द्वन्द्वस्याऽपि साध्व्याश्च विष्णुर्दृश्योऽस्मि सर्वदा ।।५०।।**
**तस्मात्कष्टेन सुभग सद्गुरुः सेवितस्त्वया । तेनैव परितुष्टोऽस्मि वरं वरय मत्प्रिय ।।५१।।**

**।। दीपक उवाच ।।**

**श्रीसद्गुरुर्देवदेवो यतो ज्ञानं ततोऽमृतम् । अतोऽधिकं किमस्माकं भवन्ति त्वादृशा वशाः ।।५२।।**

तप+साष्टाङ्ग+योगैः मननादिभिः सु+उपायैः उपवासैः व्रतैः योगैः धर्मैः (अहं) नृणां गम्यः अस्मि नो।४९। गुरु+सत्+विप्र+भक्तस्य मत्+मय+अभ्यन्तर+आत्मनः निर्दन्द्वस्य साध्व्याः च (अहं) विष्णुः सर्वदा दृश्यः अस्मि।५०। तस्मात् (हे) सुभग, त्वया कष्टेन सद्गुरुः सेवितः, तेन एव परितुष्टः अस्मि। (हे) मत्प्रिय, वरं वरय।'।५१। दीपक उवाच। 'श्रीसद्गुरुः देवदेवः यतः ज्ञानम्। ततः अमृतम्। अस्माकं अतः अधिकं किम्? त्वादृशाः वशाः भवन्ति'।५२।

'कृच्छ्रादि तपाने, अष्टांग योग अथवा मननादि सुगम उपायांनी, उपवासानी, व्रतांनी, विविध योगांनी तसेच धर्माचरणानेही मानवांना मी अप्राप्य आहे.'४९. '(मात्र) गुरू, संत, ब्राह्मण यांची भक्ती करणाऱ्या (सुखदुःखादि) द्वंद्वातीत, माझ्याशी एकरूप झालेल्या भक्तांना आणि पतिव्रता स्त्रियांना मी सदैव दृश्य असतो.'५०. 'हे भाग्यवंता, (आमच्या दर्शनानंतर कुणी भाग्यहीन असूं शकतच नाही हे सुचविण्यासाठी) मोठ्या कष्टांनी तू सद्‌गुरूंची सेवा केली आहेस. त्यानेच मी परम प्रसन्न झालो आहे. माझ्या प्रिय भक्ता, वर मागून घे.'५१. दीपक म्हणाला, 'श्री म्हणजे ऐश्वर्याने युक्त असा हा सद्‌गुरू देवांचाही देव आहे.' यांतून 'आपणही रामकृष्णादि अवतारांमध्ये गुरुभक्तिरसाचा आस्वाद घेतला आहेच कीं!' असे जणू दीपक भगवान विष्णूंना सुचवीत आहे. 'कारण या गुरूंपासून ज्ञान आणि त्या ज्ञानापासूनच मोक्ष. अर्थात्‌च ह्या सद्‌गुरूंपेक्षा अधिक असे आम्हांला काय आहे? अर्थात्‌च कांही नाही. (त्यांच्या कृपेनेच) आपणांसारखेही आमच्या अधीन होतात. 'ब्रह्मज्ञानी पुरुषाला (त्याचे अंगभूतच असलेले) सर्व देव बली - इष्टार्थ अर्पण करतात' असे वेदवचन आहे. (तै.उ. १:५:३). एवढा श्रीगुरूंचा महिमा आहे.'५२.

**चेद्विश्वेशो यथा यातस्तथा गन्तुं न रोचते । गुरावेवाचलां भक्तिं देह्यन्यत्र वृणेऽध्रुवम् ।।५३।।**

**।। विष्णुरुवाच ।।**

**श्रद्धाभक्तिः सदा तेस्ति दास्येऽप्यन्यदयाचितम् । दत्ता भुक्तिश्च ते मुक्तिः सत्कीर्तिः स्मर्तृतापहृत् ।।५४।।**
**यः स्तौति सद्गुरुं भक्त्या वेदोपनिषदादिभिः। तुष्टिर्मे तेन दास्यैश्च सान्निध्यं तस्य मे सदा ।।५५।।**

विश्वेशः यथा यातः तथा गन्तुं न रोचते चेत् गुरौ एव अचलां भक्तिं देहि। अन्यत् अध्रुवं न वृणे।५३। विष्णुः उवाच। 'श्रद्धा+भक्तिः ते सदा अस्ति। अन्यत् अपि अयाचितं दास्ये। ते भुक्तिः मुक्तिः स्मर्तृ+ताप+कीर्तिः च दत्ता।५४। यः सद्गुरुं भक्त्या वेद+उपनिषदादिभिः स्तौति तेन, दास्यैः च मे तुष्टिः। तस्य मे सदा सान्निध्यम्।५५।

'परंतु भगवान विश्वेश्वरांसारखेच आपल्यालाही परत पाठविणे मला रुचत नाही. एवढ्यासाठी, आपण मला गुरूंच्या ठायी स्थिर भक्ती द्यावी. याहून दुसरा कोणताही स्त्रीपुत्रादि नाशिवंत वर मी इच्छित नाही. कारण ते ज्ञानाला प्रतिबंधच करतील.' गुरुभक्तीच खऱ्या अर्थाने अविनाशी आहे; कारण श्रुतिवचनानुसार तीच मोक्षपर्यवसायी आहे. श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटले आहे कीं, 'ज्याची ईश्वरावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच (परम भक्ती) गुरूंवर आहे, त्याच्यां(चित्तां)तच हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील.'५३. भगवान विष्णु (अत्यंत प्रसन्नतेने) म्हणतात, 'तुझी (सद्गुरूंच्या ठायीं) श्रद्धा व भक्ती निरंतर असेल. आणखीहि तूं न मागितलेले मी देत आहे. तुला सर्व इष्ट भोग दिले. आणि या भोगांमुळे चित्ताचा विक्षेप होऊन मुक्ती दुरावूं नये म्हणून तुला मुक्तीही दिली. विषयांचे सेवन करीत असतांनाही ह्या वरदानाच्या प्रभावाने तू त्यांत आसक्त होणार नाहीस. अर्थात्च चित्ताचा विक्षेप होणार नाही आणि मुक्तीचा मार्ग सुकर होईल. मुक्त होऊनसुद्धां भोगांत रमणारा अशी निंदा लोक करतील असे तुला वाटत असल्यास तुझी उत्तम आणि (तुझे) स्मरण करणाऱ्याचे त्रिताप हरण करणारी, कीर्तीही मी देत आहे.'५४. जो सद्गुरूंचे वेद आणि उपनिषदांनी स्तवन करतो त्या स्तवनाने तसेच त्याने केलेल्या सद्गुरूंच्या दास्याने मला संतोष होतो. मी सतत त्याच्या सन्निध असतो.'५५.

**कालादपि भयं नास्ति कुतोन्यस्मात्तु सिद्धयः । स्युस्तद्दास्योऽधिकं नात इत्युक्त्वान्तर्दधे हरिः ।।५६।।**
**शिष्योऽपि गुरवे सर्वं शशंस स तु तत्क्षणम् । प्रीतः सुखाकरकरं दधौ तन्मूर्ध्नि सद्गुरुः ।।५७।।**
**तेन सद्योऽभवच्छिष्यो वेदवेदाङ्गपारगः । कुशलः स्मर्तृतापघ्नो जीवन्मुक्तोऽखिलप्रियः ।।५८।।**
**काशीप्रभावमादेष्टुं शिष्यभावं परीक्षितुम् । वेदधर्माऽभवत्कुष्ठी पापशङ्का कुतो मुनेः ।।५९।।**

'कालात् अपि भयं नास्ति, कुतः अन्यस्मात्?। सिद्धयः तत् दास्यः स्युः। अतः अधिकं न।' इति उक्त्वा हरिः अन्तर्दधे।५६। शिष्यः अपि गुरवे सर्वं शशंस। सः सद्गुरुः तु तत् क्षणं प्रीतः सुख+आकर+करं तत् मूर्ध्नि दधौ।५७। तेन शिष्यः सद्यः वेद+वेदाङ्ग+पारगः कुशलः स्मर्तृ+ताप+घ्नः जीवन् मुक्तः अखिल+प्रियः अभवत्।५८। वेदधर्मा काशी+प्रभावं आदेष्टुं, शिष्य+भावं परीक्षितुं कुष्ठी अभवत्। मुनेः पाप+शङ्का कुतः?।५९।

'सर्वसंहारक काळापासूनसुद्धा त्याला भय नसेल; मग विघ्नादि इतरांची काय कथा? सर्व सिद्धि त्याच्या दासी होतील. ह्यापेक्षा अधिक देण्यासारखे काही राहिले नाही.' असे बोलून श्रीहरि अंतर्धान पावले.५६. शिष्याने गुरूंना हे सर्व निवेदन केले. त्या सद्‌गुरूंनीही प्रसन्न होऊन तत्क्षणी सुखाची खाण असलेला आपला हात त्या शिष्याच्या मस्तकावर ठेवला. 'ज्ञानप्राप्तीसाठी शिष्याची प्रज्ञाच कारण आहे' असे वसिष्ठ मुनींनी रामाला सांगितले असले (योगवासिष्ठ निर्वाण प्र. पूर्वार्ध ६:१३) तरी '(ज्ञानाला प्रतिबंधक) परिपक्व मलांना नष्ट करण्यासाठी शक्तिपात करून (सद्‌गुरू शिष्याचा) परम तत्त्वाशी योग करून देतात,' या उक्तीवरून गुरुप्रसादही ज्ञानप्राप्तीचे कारण आहे.५७. त्या शक्तिपाताने शिष्याला तात्काळ वेदवेदांगांचे शाब्द (परोक्ष) ज्ञान तर झालेच पण परब्रह्माचा साक्षात्कारही झाला; आणि तो सर्वांना प्रिय, कुशल, केवळ स्मरणामात्रे ताप नाहीसे करणारा जीवन्मुक्त झाला.५८. काशी क्षेत्राच्या प्रभावाचे प्रबोधन करण्यासाठी तसेच शिष्याच्या भक्तीची परीक्षा घेण्यासाठी वेदधर्मा कुष्ठी झाले. एऱ्हवी मननशील अशा त्यांना पापाची शंकासुद्धा कशी स्पर्शेल?५९.

**इत्याद्या भूरिशो वृत्ताः कले गुरुकथा भुवि । वक्तृश्रोतृमलघ्न्योऽतो भक्तं मा प्रेक्ष गां व्रज ।।६०।।**
**इत्यादिष्टः कलिर्धात्रा भुवमेत्य तथाऽकरोत् । महिमा लौकिकस्यायं किं पुनस्त्र्यात्मसद्गुरोः ।।६१।।**
**तत्सात्विकीं धृतिं लब्ध्वा दृढभक्त्यैव सद्गुरुम् । भजन्ति कृतकृत्यास्ते भवन्ति न ससंशयाः ।।६२।।**
**तस्माद्यदीच्छसि श्रेयः श्रद्धयाऽसंशयं भज । गुरुं नृधाम्ना क्रीडन्तं भवाब्धेः पारमेष्यसि ।।६३।।**

**इति श्रीगुरुचरिते गुरुशिष्यचरितानुकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।२।।**

'(हे) कले, इत्याद्याः भूरिशः वृत्ताः। गुरुकथा भुवि वक्तृ+श्रोतृ+मलघ्न्यः। अतः भक्तं मा प्रेक्ष गां व्रज'।६०। इति धात्रा आदिष्टः कलिः भुवं एत्य तथा अकरोत्। अयं लौकिकस्य (गुरोः) महिमा। किं पुनः त्रि+आत्म+सद्गुरोः?।६१। तत् सात्त्विकीं धृतिः लब्ध्वा दृढ भक्त्या एव सद्गुरुं भजन्ति (ते) कृतकृत्याः भवन्ति। न ससंशयाः।६२। तस्मात् यदि श्रेयं इच्छसि श्रद्धया असंशयं नृ+धाम्ना क्रीडन्तं सद्गुरुं भज। भव+अब्धेः पारं एष्यसि।६३।

(कथा पूर्ण झाल्यावर ब्रह्मदेव म्हणतात) 'हे कले, अशा बऱ्याच घटना भूलोकी झाल्या आहेत. ह्या गुरुकथा वक्त्याच्या आणि श्रोत्याच्या पापांचा नाश करतात. तरी तू गुरुभक्तांकडे पाहू नकोस. हे ध्यानात ठेवून तू पृथ्वीवर जा'.६०. अशा ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणे कलीने पृथ्वीवर येऊन तसेच केले. हा लौकिक सद्‌गुरूंचा महिमा आहे; तर मग त्रयमूर्ति सद्‌गुरूंचा महिमा काय सांगावा?६१. असा हा दृष्टांत सांगून झाल्यावर अर्थांतरन्यासाने तो दृढ करतात. त्यासाठी गीतेत प्रतिपादलेल्या सात्त्विक धृतीची (१८:३३) प्राप्ती करून जे दृढभक्तीने सद्‌गुरूंची भक्ती करतात ते कृतकृत्य होतात; 'ज्या एकनिष्ठ धृतीने मन, प्राण, इंद्रियें यांच्या क्रिया नियंत्रित करतां येतात.' अशी धृति नसलेले संशयग्रस्त मात्र होत नाहीत.६२. त्यासाठी कल्याणाची (मोक्षाची) इच्छा असेल संशयरहित होऊन मानव देहांत लीला करणाऱ्या गुरूंची भक्ती कर. भवसागर पार करशील. 'भवाब्धिं द्राक्तरिष्यसि' असाही पाठ आहे.६३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील दुसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अथ तृतीयोऽध्यायः।।

**नामधारक उवाच ।।**

**त्रय्यात्मासौ कुतो जातो भूमौ नर इवेश्वरः । यं ब्रवीषि परं ब्रह्म तन्मे शुश्रूषवे वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**धन्योऽस्यनुगृहीतोऽसि यत्ते भक्तिरधोक्षजे । संजाता भवबन्धघ्नी हर्षो मेऽतीव वर्धते ।।२।।**

**कोऽपि गां पर्यटन्तं मां न पृच्छति गुरोः कथाम् । त्वयाद्य भक्तचन्द्रेण बोधाब्धिर्मे प्रपूरितः ।।३।।**

नामधारक उवाच। असौ त्रय्यात्मा ईश्वरः, यं परं ब्रह्म ब्रवीषि, भूमौ नर इव कुतः जातः तत् मे शुश्रूषवे वद।१। सिद्ध उवाच। धन्यः असि, अनुगृहीतः असि, यत् ते अधोक्षजे भव+बन्ध+घ्नी भक्तिः संजाता। मे हर्षः अतीव वर्धते।२। गां पर्यटन्तं मां कः अपि गुरोः कथां न पृच्छति। अद्य त्वया भक्त+चन्द्रेण मे बोध+अब्धिः प्रपूरितः।३।

अनसूयेचे सत्त्व हराया तिसऱ्या अध्यायी। स्त्रीहट्ट पुरविण्या आली देवत्रयी। झाली बाळे, अशी सतीची मोठी पुण्याई। तशीच वदले सिद्ध सरस्वति अंबरीषकथाही।।१।।

आपण केलेल्या प्रश्नांपैकी एकाचे (गुरूंचा रोष झाल्यास कुणीच (देवही) रक्षण करूं शकत नाही हे कसे?) या प्रश्नाचे उत्तर मिळाले पण 'हे गुरू त्रयमूर्ति कसे झाले?' या प्रश्नाचे 'नरदेहाने लीला करीत आहेत' असे संकेतात्मक उत्तर मिळाल्याने अधिक स्पष्टीकरणाच्या अपेक्षेने नामधारक विचारीत आहे. 'ज्याला आपण परब्रह्म असे म्हणतां अशा ह्या त्रिमूर्ति भगवंताने मानवासारखा पृथ्वीतलावर कसा जन्म घेतला? ते मला ऐकायचे आहे तरी (कृपा करून मला) सांगा.'१. सिद्धमुनि त्याचे अभिनंदन करीत म्हणतात, 'धन्य आहेस. तुझ्यावर (गुरूंचा) अनुग्रह झाला आहे. तुझ्या मनांत संसारपाशांतून सोडवणारी भगवद्भक्ती उद्‌भवली आहे हे पाहून मला अतीव आनंद झाला आहे.'२. '(खरोखर) ह्या भूमीवर विचरत असतां मला कुणीही गुरूच्या कथा विचारीत नाही. तुझ्यासारख़्या भक्तरूपी चंद्राच्या दर्शनाने माझा ज्ञानसागर उचंबळून आला आहे.'३.

**अनन्ताः सन्त्यनन्तस्य लीलाः प्रश्नमृतेपि ताः । न वक्तुर्यान्ति निजधी-परिणामावधिं स्मृतिम् ।।४।।**
**कलौ तु नास्तिका मर्त्यास्तत्कथाश्रवणात्मकम् । प्लवं तर्तुं भवाब्धिं नो विदुर्मज्जन्त्यतोऽत्र ते ।।५।।**
**यत्राम्बविन्तु तृष्णोर्मिर्ग्रहाः कामादयो ध्वनिः । भोगोऽपारेऽत्र नौस्त्वेषा गुरुर्नेता कृपामरुत् ।।६।।**

अनन्तस्य लीलाः अनन्ताः सन्ति। निज+धी+परिणाम+अवधिं वक्तुं ताः अपि प्रश्नं ऋते स्मृतिं न यान्ति।४। कलौ तु नास्तिकाः मर्त्याः भवाब्धिं तर्तुं तत्+कथा+श्रवण+आत्मकं प्लवं नो विदुः। अतः ते अत्र मज्जन्ति।५। यत्र अवित् तु अम्बुः, तृष्णा ऊर्मिः, कामादयः ग्रहाः, भोगो ध्वनिः। अत्र अपारे तु एषा नौ, गुरुः नेता, कृपा मरुत्।६।

'अनंत अशा भगवंताच्या लीला अनंत आहेत. आपल्या बुद्धीच्या मर्यादानुसार त्या आठवल्या तरी कुणी तरी प्रश्न केल्याशिवाय त्या सांगितल्या जात नाहीत.'४. या कलियुगातील नास्तिक मानवांना भवसागरातून तारणारी गुरुकथाश्रवणरूपी नौका माहीत नसल्याने ते ह्या संसारसागरांत बुडत असतात.'५.

**भवसागर -** ज्या भवसागरांत, अज्ञान हेच पाणी आहे, आशांच्या उंच उंच लाटा आहेत, कामक्रोधादि षड्रिपु ह्याच सुसरी आहेत, सुखदुःखांच्या भोगाने प्रस्फुटणारे हर्षशोकाचे ध्वनि हेच त्या सागराचे गाज आहेत. ह्या अपार भवाब्धीत ही गुरुकथा नावेसारखी आहे, गुरूच सारंग आहेत आणि त्यांची कृपा हाच अनुकूल वारा आहे. भगवत्पूज्यपादाचार्यांनी (ऐतरेय उपनिषदातील १:२:१ या मंत्रातील *'अस्मिन्महत्यर्णवे'* या पदावरील भाष्यांत) असे रूपक केले आहे. 'अविद्या, काम आणि कर्म यांच्यायोगे झालेले प्रचंड दुःख हेच पाणी; तीव्र व्याधी, जरा आणि मृत्यू ह्याच सुसरी-मगरी; विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणाऱ्या सुखालेशाचा क्षणभंगुर विसावा सोडल्यास पांचही इंद्रियांच्या तृष्णारूपी वायूने क्षोभविलेल्या शेकडो अनर्थांच्या प्रचंड लाटा; महारौरवादि अनेक नरकातील जीवांच्या हाहाःकाराच्या आक्रोशातून घुमणारा कल्लोळ; असा हा अनादि, अनंत, अपार, निराधार संसारसागर! इथे सत्य, आर्जव, दान, दया, अहिंसा, शम, दम, धृति इत्यादि आत्मगुणांच्या शिदोरीने भरलेली ज्ञानरूपी नौका आहे; सत्संग आणि सर्वत्याग हाच मार्ग आहे आणि मोक्ष हे तीर आहे.'६.

**तस्माद्दिष्ट्या साधनानि प्राप्तान्यत्राप्ययत्नतः । तरिष्यसि भवाब्धिं स्नागतो वक्ष्ये कथाः श्रृणु ।।७।।**
**इत्युक्त्वाऽमरजाभीमासङ्गमे ह्युपविश्य सः । गुर्वधिष्ठितकल्पद्रु-मूलेऽस्मै प्राह सत्कथाः ।।८।।**
**मुमुक्षुभेषजं मुक्त-जीवनं विषयीष्टदं । श्रीगुरोश्चरितं वाग्हृद्दूरत्वाद्वच्मि तेऽल्पकम् ।।९।।**

तस्मात् दिष्ट्या अत्र अयत्नतः अपि साधनानि प्राप्तानि। भवाब्धिं स्नाक् तरिष्यसि। अतः कथाः वक्ष्ये। शृणु।७। इति उक्त्वा सः अमरजा+भीमा+सङ्गमे गुरु+अधिष्ठित+कल्प+द्रु+मूले हि उपविश्य अस्मै सत्कथाः प्राह।८। श्रीगुरोः चरितं मुमुक्षु+भेषजं मुक्त+जीवनं विषयी+इष्टदं वाक्+हृत्+दूरत्वात् ते अल्पकं वच्मि।९।

त्याप्रमाणे सद्‌भाग्याने सद्‌गुरुभेट आणि गुरुकथाश्रवण ही साधने अनायासे तुला इथे लाभली आहेत. तू शीघ्रच भवसागर तरून जाशील. तरी मी कथा (गुरुचरित्र) सांगतो ती तू ऐक.'७. असे बोलून ते सिद्ध मुनि भीमा आणि अमरजा संगमावर श्रीगुरू नरसिंहसरस्वतींनी स्थापिलेल्या कल्पवृक्षाच्या तळवटी बसून ह्या शिष्यत्वाने अंगीकारलेल्या नामधारकाला गुरुचरित्रातील सुंदर कथा (किंवा सत् म्हणजे भगवंत त्याच्या कथा - भगवत्कथा) सांगू लागले. श्रीगुरूंनी स्थापल्याने त्या अश्वत्थाला कल्पवृक्षत्व आले आहे. शिवाय त्या वृक्षांत मनोकामना पूर्ण करण्याचा गुण आहे हे पुढे १९व्या अध्यायात स्पष्ट केले आहेच. ('ह्या अक्षय्य पुण्यदायक वृक्षाला पुत्रादि कामना पुरविण्यास वेळ लागत नाही.'(४५) 'तरी हे साध्वि, तू त्याची विधिवत् पूजा कर; तो शीघ्र फल देणारा आहे.'(४८).८.

**श्रीगुरुचरित्राची थोरवी -** ह्या मृत्युलोकात विषयासक्त, मुमुक्षु आणि मुक्त असे तीन प्रकारचे लोक आहेत. त्या तिघांनाही हे श्रीगुरूंच्या चरित्राचे वाचन कसे लाभदायक आहे ते सांगतात. विषयी लोकांच्या कामना ह्याच्या पठणाने अथवा श्रवणाने पूर्ण होतात; तर मुमुक्षूंसाठी ते संसाररूपी व्याधीपासून सोडविणारे औषध आहे; मुक्तांना निरुपम आनंदाचा ठेवा असल्याने जीवनभूत आहे; तसेच 'वेदांत, गुरु आणि ईश्वर या त्रयीचे आजीवन सेवन करावे. आधी ज्ञानप्राप्तीसाठी आणि (ज्ञानप्राप्ती)नंतर कृतघ्नतादोष लागू नये यासाठी', (तत्त्वोपदेश - ८६)

**जगत्येकार्णवीभूते शेषतल्पश्रितोऽस्पृहः । नारायणो जगत्स्रष्टुं मायामुद्भाव्य सोऽण्डजम् ।।१०।।**
**स्रष्टारं व्यसृजत्सृष्ट्यै सप्तर्षीन् सोऽपि मानसान् । तत्रैकोऽत्रिस्तपस्वीशो यस्याभूद्भगवान्सुतः ।।११।।**

जगति एक+अर्णवी+भूते शेष+तल्प+श्रितः अस्पृहः नारायणः मायां उद्भाव्य सः अण्डजं स्रष्टारं व्यसृजत्। सः अपि मानसान् सप्तर्षीन् (असृजत्)। तत्र एकः तपस्वी अत्रिः यस्य ईशः भगवान् सुतः अभूत्।१०-११।

या वचनानुसार कृतघ्नता दोषाचा परिहार करून जीवन सफल करणारे आहे. गुरुचरित्रांत वेदांत, गुरू आणि ईश्वर या तिन्हींचेही प्रतिपादन आहे. हे गुरुचरित्र *'यतो वाचो निवर्तन्ते'* ह्या श्रुतीप्रमाणे (तै.उ. २:४), वाणीच्या आणि मनाच्याही अतीत आहे. तरी मी माझ्या बुद्धीप्रमाणे थोडेसे तुला सांगतो.९.

दुसऱ्या परार्धाच्या अंती ब्रह्मदेवाच्या दिनांतीं जो नैमित्तिक प्रलय होतो त्यावेळी सर्व जग जलमय झाल्याने एक समुद्रच राहतो. अशा त्या जलांतही शिल्लक असलेला जो शेष त्याचीच शय्या करून निष्काम असा नारायण ('नर' म्हणजे मानव; त्याच्यापासून झालेली तत्त्वे म्हणजे 'नार'; तीच ज्याचे *'अयन'* प्राप्तीचे उपाय आहेत. किंवा *'नार'* म्हणजे मानवसमुदाय हेच ज्याचे निवासस्थान आहेत तो (मनुस्मृति १:१०)) पहुडला असतां जगाची उत्पत्ती करण्यासाठी त्याने सदसद्विलक्षण अशी आपली अनिर्वाच्य प्रकृति निर्माण केली. जी खरी आहे किंवा नाही ह्याविषयी मानवी बुद्धीला निर्णय करतां येत नाही. निर्माण केली याचा या ठिकाणी अर्थ तिला आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) कार्यान्वित करून अंडापासून जन्मलेल्या ब्रह्मदेवाला जागे केले. (**उद्भाव्य** याचा अर्थ इथे जागे केले असा होतो. कारण हा नैमित्तिक प्रलय आहे जेव्हा ब्रह्मदेव झोपलेला असतो. प्राकृतिक प्रलयांती ब्रह्मदेवाचाही लय होत असल्याने त्या वेळी सृष्टीसाठी पुन्हां ब्रह्मदेवाची उत्पत्ति करावी लागते.) त्या जागलेल्या ब्रह्मदेवानेही मरीचि, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, पुलह, अंगिरस आणि दक्ष ह्या सप्तर्षींना आणि सनत्कुमार, सनक, सनन्दन, सनातन आणि नारद ह्या मानसपुत्रांना निर्माण केले. त्यांमध्ये अत्रि हा श्रेष्ठ तपस्वी होता, ज्याच्या पोटी भगवान श्रीदत्तप्रभूंनी जन्म घेतला.१०-११.

**ऋषेरत्रेस्तपोऽर्थस्य पातिव्रत्यविभूषिता । आसीद् भार्याऽनसूयाख्या त्रिलोक्यां विश्रुता सती ।।१२।।**
**जातोर्वी मृदुलार्काग्नी शीतौ मन्दो मरुद्भिया । तस्या देवाः पदापाय-भ्रान्त्याऽऽपुः शरणं हरिम् १३।।**
**एकदा नारदोऽप्येत्य तद्धर्मान्ब्रह्मविष्णवजान् । प्राब्रवीन्नेदृशी साध्वी सर्वदाऽभ्यागतप्रिया ।।१४।।**

तपः+अर्थस्य ऋषेः अत्रेः पातिव्रत्य+विभूषिता भार्या त्रिलोक्यां विश्रुतां सती आसीत्।१२। तस्या भिया ऊर्वी मृदुला, अर्क+अग्नी शीतौ, मरुत् मन्दः जाताः। देवाः पद+अपाय+भ्रान्त्या हरिं शरणं आपुः।१३। एकदा नारदः अपि ब्रह्म+विष्णु+अजान् एत्य तत् धर्मान् प्राब्रवीत्, 'सर्वदा अभ्यागत+प्रिया ईदृशी साध्वी न'।१४।

ईश्वराने सृष्टि उत्पन्न केल्याविषयी वेदवचने यापूर्वी (प्रथमाध्यायाच्या टीकेत) उद्धृत केली आहेत. इथे हे लक्षांत घ्यायला हवे की ईश्वराचे कर्तृत्व हे या वेदवाक्यांचे तात्पर्य नाही; तर ईश्वराच्या कर्तृत्वाचा निषेध करण्यासाठी आधी मायेचा विलास (सृष्टी) दाखविला आहे. आणि मग *'निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरञ्जनं'* (श्वेताश्वतर उ. ६:१९) *'एकधैवानुद्रष्टव्यं'* (बृहदारण्यक उ. ४.४.२०) *'नेह नानास्ति किञ्चन'* (कठ उ. २.४.११) *'यस्मिन्सर्वा..'* (ईशावास्य उ. ६) *'अतोऽन्यदार्त्तं'* (बृहदारण्यक उ. ३.४.२) अशा निषेधवाक्यांनी अद्वैताचा निरास केला आहे. यापेक्षा इथे विस्तार करीत नाही.

**अत्रि आणि अनसूया -** प्रस्तुत ग्रंथांत श्रीदत्तात्रेयांचे प्राधान्य असल्याने त्यांच्या अवताराचा उपोद्घात **ऋषेः** या श्लोकापासून केला आहे. ऋषी म्हणजे मंत्रदृष्टा. ऋग्वेद सर्वानुक्रमणीत सांगितल्याप्रमाणे अत्रि ऋषी ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलाचे द्रष्टे आहेत. 'सूर्याला राहूने अंधःकाराने झांकोळले असतां अत्रि ऋषींनीच त्याला सोडविले. इतर कुणालाही ते शक्य झाले नाही' असा अत्रि ऋषींच्या ज्ञानाचा गौरव ऋग्वेदात केला आहे (ऋ. ४.४०.९). तप हेच ज्याचे अर्थ म्हणजे सर्वस्व आहे अशा अत्रींची पत्नी अनसूया होती. नांवाप्रमाणेच जिच्यात असूयेचा लेशही नव्हता. 'रसाकर' नांवाच्या ग्रंथात, केसांत घालायची, देहावर घालायची, परिधान करायची आणि विलेपन करायची अशी चार प्रकारची आभूषणे सांगितली असली तरी अनसूयेचे पातिव्रत्य हेच एकमेव भूषण होते हाच विशेष! तीनही लोकांत तिच्या पातिव्रत्याची ख्याति होती.

**इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य विषीदन्त्य उपस्थिताः । तद्देव्योऽसहमाना द्राग्बभूवुर्मूर्छिता भृशम् ।।१५।।**
**पतिव्रतामानिनीस्ताः सावित्रीश्रीश्वरीस्त्रयः । आश्वास्यातिथिवद्भूत्वा रोषाच्छम्भुं सतीं ययुः ।।१६।।**

इति ऋषेः वाक्यं आकर्ण्य उपस्थिताः तत्+देव्याः विषीदन्त्य द्राक् असहमाना भृशं मूर्छिता बभूवुः।१५। पतिव्रता+मानिनीः ताः त्रयः सवित्री+श्री+ईश्वरीः आश्वास्य (देवाः) अतिथिवत् भूत्वा रोषात् सतीं शम्भुं ययौ।१६।

'अत्रीची जशी अनसूया' असा तिचा दाखला वेदमंत्रांतही दिला आहे (ऋग्वेद परिशिष्ट).१२. 'ज्या परमात्म्याच्या धाकाने अग्नी, सूर्य, इंद्र, वायु, मृत्यू हे पाचही आपापली कार्ये करतात' (कठ उ. २.३.४) तोच धर्माचा आधार आहे. (*'एष सेतुर्विधरण'* बृ.उ. ४.४.२२) असा धर्मरूपी परमात्माच अनसूयेने आपल्या आचरणात स्वाधिकाराने संपूर्णतः धारण केल्याने, पृथ्वी त्या सतीला दुखवू नये म्हणून मृदु झाली, अग्नी आणि सूर्य शीतल झाले आणि वायुसुद्धा तिच्या भयाने मंद वाहू लागला. सर्वच देवतांना आपापल्या पदांपासून ही अनसूया भ्रष्ट तर करणार नाही ना असा धाक उत्पन्न झाला आणि ते भगवान विष्णूंना शरण गेले.१३. एकदा नारदमुनीनीसुद्धा त्या अनसूयेच्या पातिव्रत्य, आतिथ्य आदि धर्माचरणाचे वर्णन ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांच्यापुढे करून 'अशी सदैव अतिथींचा स्नेहाने सत्कार करणारी अनसूयेसारखी साध्वी कुणीच नाही' असे उद्‌गार काढले.१४. हे देवर्षींचे वचन ऐकतांच तिथे जवळच असलेल्या तिन्ही देवांच्या पत्नींचा 'विश्वात आम्हीच काय त्या पतिव्रता' असा अभिमान दुखावला आणि मत्सरामुळे झालेला संताप सहन न होऊन त्या मूर्छित झाल्या.१५. सावित्री, लक्ष्मी आणि पार्वती यांची ही अवस्था पाहून त्यांना आश्वासन देऊन ब्रह्मा-विष्णु-महेश त्वेषाने अतिथिवेष घेऊन अत्रिऋषींच्या आश्रमाला अनसूयेकडे आले. खरे तर आत्माराम ईश्वरांना अशी प्रवृत्ती होण्याचे कारणच नाही; पण स्त्रियांच्या बुद्धीने वागल्यास कसा अनर्थ होतो हे जणू जगात दाखविण्यासाठीच ते सतीच्या सत्त्वहरणाला प्रवृत्त झाले. किंवा 'अरोषात्' असा विग्रह करून स्त्रियांच्या समाधानासाठी ते निघाले तरी ते शांतपणेच 'पतिव्रता नारी ही तीर्थ आहे' ह्या स्मृतिवचनाच्या द्योतनासाठी निघाले.१६.

**पतिव्रतापि तान्दृष्ट्वा स्वाश्रमाभ्यागतान्सुरान् । प्रत्युद्गत्वा समानीय स्वासने संन्यवेशयत् ।।१७।।**
**वीजितान्कृतपच्छौचान्सूपविष्टान्जगौ सती । स्वागतं वोऽद्य किं कार्यं मुनिस्तु तपसे गतः ।।१८।।**
**त ऊचुः साध्वि नो विद्मस्तपःसक्तमना मुनिः । कदाऽऽयातीत्यतो देहि क्षुधितेभ्योऽन्नमाश्वलम् ।।१९।।**
**इति श्रुत्वा गिरस्तेषां तथेत्युक्त्वा गृहं गता । पात्राण्यासाद्य तेभ्योऽन्नं परिविष्टं न्यवेदयत् ।।२०।।**

पतिव्रता अपि तान् स्वाश्रम+अभ्यागतान् सुरान् दृष्ट्वा प्रत्युत्+गत्वा समानीय सु+आसने संन्यवेशयत्।१७। वीजितान् कृत+पत्+शौचान् सु+उपविष्टान् (तान्) सती जगौ। वः स्वागतम्। अद्य किं कार्यम्? मुनिः तु तपसे गतः।१८। ते ऊचुः। (हे) साध्वि मुनिः तपः+सक्त+मनाः नः विद्मः। कदा आयाति? अतो क्षुधितेभ्यः आशु अलं अन्नं देहि।१९। इति तेषां गिरः श्रुत्वा 'तथा' इति उक्त्वा गृहं गता पात्राणि आसाद्य तेभ्यः परिविष्टं अन्नं न्यवेदयत्।२०।

त्या सतीनेही त्या अतिथिवेषांतील देवांना पाहून त्यांना सामोरे जाऊन, सन्मानाने घरांत आणून आपापल्या सुशोभित आसनांवर बसविले. त्यांचे पाय धुवून ते स्वस्थ बसल्यावर त्यांना कुशलप्रश्न विचारून पंख्याने वारा घालीत ती बोलली, 'आपलं स्वागत असो! मुनिवर तर तपस्येला गेले आहेत. आपण आज आपले काय कार्य आहे ते मलाच सांगावे.' त्यावर ते देव म्हणाले, 'मन आणि इंद्रिये यांचे ऐकाग्र्य हेच परम तप सर्व धर्माहून श्रेष्ठ आहे; तोच परम धर्म आहे' (महाभारत १२.२५०.२) ह्या वचनानुसार बाह्य इंद्रिये आणि अंतःकरण यांचे समाधान (संतुलन) हे तपच ब्रह्मप्राप्तीचे द्वार आहे. ऋषिवर्यांना त्याची आवड आहे हेही आम्हाला माहिती आहे. तेव्हा ते कधी येतील काय सांगावे? आम्ही भुकेजलो आहोत. तरी तू आम्हांला लवकर (मुनींची वाट न पाहता) पुरेसं अन्न दे.'१९. हे त्यांचे बोलणे ऐकून 'ठीक आहे, जेवायला वाढते' असे म्हणून अनसूयेने स्वयंपाकघरांत जाऊन ताटांत अन्न वाढून आणले. त्यांच्यापुढे ताटे ठेवून पाणी फिरविले आणि त्यांना जेवायची विनंति केली.२०.

**त आहुः साध्वि नो देहि नग्ना भूत्वेत्यपेक्षितम् । नेदं चेद्रोचतेऽन्यत्र गच्छामः क्षुधिता इतः ।।२१।।**
**तच्छ्रुत्वापि प्रहस्यैषा ऋषेः सङ्गात्तपस्विनः । पूताया मम कामेन किं भवेच्चेत्तथाऽकृते ।।२२।।**
**शप्त्वा गच्छन्ति विमुखा महान्तोऽमी ममात्मजाः । इति स्वगतमुद्भाव्य तथेत्युक्त्वांशुकं जहौ ।।२३।।**

ते आहुः, '(हे) साध्वि, नः नग्ना भूत्वा देहि इति अपेक्षितम्। इदं न रोचते चेत् इतः क्षुधितः अन्यत्र गच्छामः।२१।' तत् श्रुत्वा अपि प्रहस्य 'तपस्विनः ऋषेः सङ्गात् पूताया मम कामेन किं भवेत्? तथा अकृते महान्ताः विमुखाः शप्त्वा गच्छन्ति। अमी मम आत्मजाः।' इति स्वगतं उद्भाव्य 'तथा' इति उक्त्वा अंशुकं जहौ।२२-२३।

त्यावर ते तिघे देव म्हणाले, 'हे सती, तू विवस्त्र होऊन आम्हांला (अन्न) वाढावेस अशी आमची इच्छा आहे. हे तुला रुचत नसेल तर आम्ही उपाशीच इथून निघून इतरत्र जाऊ.'२१. त्यावर अनसूया सती हे त्यांचे विपरीत बोलणे ऐकूनही हसली आणि मनातच विचार करू लागली, 'तपस्वी (अत्रि) मुनींच्या संगाने माझे अंतःकरण शुद्ध झाले आहे. मला कामविकाराचे काय भय?' पातिव्रत्याचा भंग करणारा कसलाही विचारच माझ्या मनात येऊ शकत नाही असा तिला आत्मविश्वास होता. अतिथिसत्काराच्या इच्छेनेसुद्धा परपुरुषासमोर नग्नावस्थेत वावरणे हे प्रायचित्ताला कारण ठरू शकेल अशीही शंका नको. *'कामोऽकार्षीत् कामः करोति नाहं करोमि, कामः कर्ता नाहं कर्ता, कामः कारयिता नाहं कारयिता'* (नारायणोपनिषत् ६१) हा मंत्र विवेकी लोकांना कामविकाराचा आत्म्याशी कांहीच संबंध नाही हेच शिकवतो; अविवेकी लोकांसाठी मात्र प्रायश्चित्ताला उपयुक्त ठरतो. तेव्हा मला कामाची काय भीती? ह्याउलट मी जर ह्यांच्या सांगण्यानुसार वागले नाही तर आम्हांला शाप देऊन हे महात्मे निघून जातील. तेव्हां *'स इद्भोज'* या मंत्रांच्या (ऋग्वेद १०.११७.३) अतिथींचा सत्कार करण्याने इष्टफल आणि न करण्याने अनिष्ट फलप्राप्तीच्या अन्वय आणि व्यतिरेकाने केलेल्या प्रतिपादनानुसार आपण ह्यांच्या मनाप्रमाणे करावे असा मनोमन निश्चय करून त्या सतीने अंगावरील वस्त्र काढून टाकले.२३.

**तदैव तेऽभवन्बाला निर्विकारा अपीश्वराः । जगत्सृडीश्वरहराः पातिव्रत्यप्रभावतः ।।२४।।**
**तान्सा तथाविधान्प्रेक्ष्य सचित्राभूद्धृतांशुका । पयः प्रसूत्या इवास्यास्तदालं स्तनतोऽस्रवत् ।।२५।।**
**सपद्येवाद्भुताविष्टा प्रेम्णा हृष्टतनूरुहा । प्रत्येकं पाययामास क्षीरं तेऽपि पपुर्मुदा ।।२६।।**
**जगदुत्पत्तिकरण-सुश्रान्त इव विश्वसृट् । पीत्वा पतिव्रतास्तन्यं परमां शान्तिमाययौ ।।२७।।**
**विश्वम्भरो विश्वरक्षा-क्रियात्रस्त इवामलम् । पतिव्रतापयः प्राश्य पीनां विश्रान्तिमाविशत् ।।२८।।**

तदा एव ते ईश्वराः जगत्+सृट्+ईश्वर+हराः अपि पातिव्रत्य+प्रभावतः निर्विकाराः बालाः अभवन्।२४। सा तान् तथाविधान् प्रेक्ष्य सचित्रा धृत+अंशुका अभूत्। तदा अस्याः स्तनतः प्रसूत्याः इव अलं पयं अस्रवत्।२५। सपदि एव अद्भुत+आविष्टा हृष्ट+तनू+रुहा प्रेम्णा प्रत्येकं क्षीरं पाययामास। ते अपि मुदा पपुः।२६। विश्व+सृट् जगत्+उत्पत्ति+करण+सुश्रान्त इव पतिव्रता+स्तन्यं पीत्वा परमां शान्तिं आययौ।२७। विश्वं+भरः विश्व+रक्षा+क्रिया+त्रस्त इव पतिव्रता+पयं अलं प्राश्य पीनां विश्रान्तिं आविशत्।२८।

तत्क्षणीच जगाची उत्पत्ति करणारा ब्रह्मदेव, नियंता विष्णू आणि संहर्ता शंकर ह्या तिघाही ईश्वरांची पातिव्रत्याच्या प्रभावाने निरागस बाळे झाली.२४. ती पतिव्रता त्या अतिथींची अशी बाळे झालेली पाहून आश्चर्यचकित झाली आणि आपली सोडलेली वस्त्रे परत नेसली. त्या वेळी नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीप्रमाणे तिच्या स्तनांतून दूधाच्या धारा सुरू झाल्या.२५. लगेच त्या आश्चर्याने थक्क झालेल्या अनसूयेला प्रेमाचे भरते आले आणि तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. एकेका बाळाला अंगावर घेऊन ती पाजायला लागली. ती बाळेही अत्यंत आनंदाने दूध पिऊ लागली.२६. जगाच्या उत्पत्तिकार्याने (जणू) थकून गेलेल्या ब्रह्मदेवाला ते पतिव्रतेचे दूध पिऊन परम शांतीचा अनुभव आला.२७. विश्वंभर विष्णू सतत विश्वाचा सांभाळ करून (जसा काही) त्रस्त झाला होता. पतिव्रतेचे दूध पोटभर पिऊन त्याला विश्रांती मिळाली.२८.

**हरस्तु विश्वसंहार-कर्मतष्ट इव क्षणात् । सत्यौधस्याशनात्तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ ।।२९।।**
**स्वधर्मज्ञाततत्सत्त्वा पाययित्वाऽपि तान्पयः । सा जगौ तत्कथोद्धातं प्रेम्णा विन्यस्य पालके ।।३०।।**
**अत्रान्तरे वनादेत्य श्रुतगीतः सतीमुखात् । सर्वं श्रुत्वेश्वरान्ज्ञात्वा ध्यानान्नत्वाऽस्तुवन्मुनिः ।।३१।।**
**विश्वसर्गस्थितिप्रान्त-निदानं विश्वसाक्षिणम् । विष्णुं विश्वमयं वन्दे विश्वाद्यं विश्वसंग्रहम् ।।३२।।**

हरः तु विश्व+संहार+कर्म+तष्ट इव सती+औधस्य+अशनात् क्षणात् तृप्तः पुष्टिवर्धनतां ययौ।२९। स्वधर्म+ज्ञात+तत्+सत्त्वा अपि तान् पयः पाययित्वा प्रेम्णा पालके विन्यस्य सा तत्+कथा+उद्घातं जगौ।३०। अत्र+अन्तरे मुनिः वनात् एत्य, सती+मुखात् सर्वं श्रुत्वा ध्यानात् ईश्वरान् ज्ञात्वा नत्वा अस्तुवन्।३१। विश्व+सर्ग+स्थिति+प्रान्त+निदानं विश्व+साक्षिणं विश्व+मयं विश्व+आद्यं विष्णुं वन्दे।३२।

विश्वसंहाराच्या कर्माने जणू रोडावलेल्या रुद्राला सतीचे स्तन्य (उधस् म्हणजे स्तन त्यापासून झालेले ते औधस्य) पिऊन पुष्टी आली आणि 'सुगंधिं पुष्टिवर्धनम्' (ऋग्वेद सं. ७.५९.१२) ह्या रुद्रमंत्रानुसार इतरांचीही पुष्टी वाढविण्याचे सामर्थ्यही त्यांच्यात आले.२९. आपल्या पातिव्रत्यधर्माच्या प्रभावाने त्या बालकांचे ईश्वरत्व जाणून, ती अनसूया त्यांना दूध पाजून, पाळण्यात घालून भक्तिप्रेमाने त्यांच्या कथा गाऊ लागली.३०. थोड्या वेळाने (आह्निक पूर्ण करून) वनाहून आलेल्या अत्रि ऋषींनी आपल्या पत्नीचे गायन ऐकले आणि तिच्याच मुखाने सर्व हकीकतही ऐकली. मग त्यांनी ध्यानाच्या प्रभावाने त्या भगवंतांना ओळखले आणि त्यांची स्तुती केली.३१. 'रजोगुणाच्या प्रादुर्भवाने विश्वाची उत्पत्ती (**सर्ग**), सत्त्वगुणाने **स्थिति** (दुष्टांचे दमन आणि साधूंचे रक्षण) आणि तमोगुणाने प्रलय (**प्रान्त**) ह्या सर्वांचे अभिन्ननिमित्तोपादानरूप आदिकारण (**निदान**) आपण आहां. विश्वाच्या आंत *'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा'* (याच्यावांचून कोणी दुसरा पहाणारा नाही) या वेदोक्तीप्रमाणे (बृ.उ. ३.७.२३) साक्षित्वाने राहूनही निर्लिप्त आहां.' *'सु'* चांगली *'पर्णं'* गति किंवा परस्पर सहाय ज्यांचे आहे असे *'सयुजौ'* सारखे *'सखायौ'* सखे *'द्वा'* दोन पक्षी, जीव आणि ईश्वर,

**तपस्तप्तं यदर्थं स त्वमेकोऽपीश लीलया । त्रिधा भूत्वात्मनात्मानं स्वैर्गुणै रमयस्युत ॥३३॥**

(हे) ईश यत्+अर्थं तपः तप्तं सः त्वं एकः अपि लीलया स्वैः गुणैः त्रिधा भूत्वा आत्मना आत्मानं रमयसि उत।३३।

*'समानं'* एकाच *'वृक्षं'* वृक्षावर ('ओव्रू छेदने' ह्या धातूपासून तत्त्वज्ञानाने छेदण्यास योग्य,) भगवद्गीतेच्या १५व्या अध्यायातील रूपकानुसार शरीराला *'परिषस्वजाते'* बिलगलेले, वसलेले आहेत. *'तयोः'* त्यांच्यापैकी *'एकः'* जीव *'स्वादु'* (कडू)गोड *'पिप्पलं'* कर्मफळे *'अत्ति'* खातो, भोगतो म्हणून (कर्म)बंधनांत सांपडतो. *'अन्यः'* दुसरा ईश्वर मात्र *'अनश्नन्नभिचाकशीति'* न खातां (चांगल्या वाईट कर्मफलांचा भोग न घेतां) केवळ साक्षित्वाने पहात असतो. (ऋग्वेद १.१६४.२०) 'असा जर मी आहे तर मग मी परिच्छिन्न आहे का?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात **विष्णुं** व्यापनशील अर्थात् सर्वव्यापी, देश, काल, वस्तु या सर्व परिच्छेदांपासून मुक्त आहां. 'असे असेल तर माझ्याहून वेगळ्या अशा या जगाची गति काय?' हा प्रश्न अपेक्षून म्हणतात, विश्वरूपी अध्यासाचा विवर्त या न्यायाने आपण विश्वाचे आद्य कारण असून आपल्यापासून वेगळे अस्तित्त्वच त्याला नाही; त्यामुळे आपण **विश्वमय** आहात. सर्प, माला, जलधारा, काठी इत्यादि भासमान रूपांना केवळ एका दोरीहून अन्य काही वास्तवता नसते त्याप्रमाणे नामरूपात्मक जगताचे आपणच एकमेव वास्तव आहांत (ऐतरेयारण्यक २.४.१). अशा आपल्याला वन्दन असो.३२. ज्या परमात्म्याच्या दर्शनासाठी मी तप आचरले तो तू एकच भगवंत लीलेने, स्वनिर्मित सत्त्व, रज आणि तम या गुणांचा अंगीकार करून ब्रह्मा, विष्णू आणि शंकर अशी तीन रूपे धारण करून आपणच आपल्याशी खेळत असतोस.३३.

**अध्यारोपापवादाभ्यां समुद्भूतं जगत्ततः । अहंममाभिमानेन पार्थक्यं त्वस्य नापरम् ।।३४।।**

जगत् अधि+आरोप+अप+वादाभ्यां समुद्भूतम्। ततः अहं+मम+अभिमानेन तु अस्य पार्थक्यं, न अपरम्।३४।

**अध्यारोप आणि अपवाद -** तुझ्या या अविकृत स्वरूपापासूनच अध्यारोपाने - अध्यासाने, जगताची सृष्टी होते. आणि त्या अध्यासाच्या अपवादाने - निराकरणाने, तो जगदाभास लय पावतो. जसा अंधारात पडलेल्या दोरीवर सापाचा **अध्यारोप** होतो आणि दिवा लावून तो संभ्रम दूर केला की तो साप नाश पावतो तसेच हे आहे. ईश्वरसृष्टीत परमात्म्याच्या मायेकडे दृष्टिक्षेपणाने - ईक्षणाने, ह्या प्रक्रियेला आरंभ होतो आणि सोळा (पांच भूते आणि अकरा इंद्रिये) अंशांच्या जड विश्वात त्याच्या प्रवेशाने ती प्रक्रिया पूर्ण होते. जीवसृष्टीत हीच प्रक्रिया जाग्रत अवस्थेपासून सुरू होऊन आत्मज्ञानाने पूर्ण होते. अशा रीतीने भासमान होणाऱ्या जगतातील देहादिक उपाधीसंबंधी 'मी' असा अभिमान, घरदार, पत्नी, पुत्र, धन पशू इत्यादिकांविषयी 'माझे' असा अभिमान हेच आपल्या अविकृत स्वरूपात भेदाचा **(पार्थक्याचा)** आभास निर्माण करतात. **तु** शब्दाने हा मिथ्या असल्याचे सूचित केले आहे. आत्मसाक्षात्काराने हे नामरूपात्मक द्वैत (**अपरं**) नाहीसे होते. देहात प्रविष्ट होऊन जन्म-मरण-जाग्रति-स्वप्न-सुषुप्तिरूप संसारचक्रांत फिरणारा जीव कधीकाळी परमेश्वराच्या कृपेने, गुरू आणि शास्त्र यांच्या प्रसादाने, हे सर्व अनुभवाला येणारे पांचभौतिक जग, त्यांतील प्राणिमात्र हे कुठून येतात, यांचे रक्षण कोण करतो आणि यांचा लय शेवटी कुठे होतो याविषयी विचार करतो. नाना शास्त्रे धुंडाळून (परोक्ष ज्ञान) हा सर्व संसार मायेने कल्पिलेला असून मिथ्या आहे असा तो निश्चय करतो. मग अपरोक्ष ज्ञानाने म्हणजेच आत्मानुभवाने ब्रह्म हेच परम सत्य आहे अशी अनुभूती घेतो. हाच **अपवाद** होय. त्यानेच परब्रह्मस्वरूप आपल्याहून वेगळे कांहीच नाही, एकच (परमात्मा) सर्वां ठायी पहावा, या जगात नानाविध असे कांही नाही अशी त्याची खात्री पटते (बृ.उ. ४:४:१९-२०). मग अशा ह्या एकमेवाद्वितीय ब्रह्माची तीन रूपे कशी झाली असे म्हणाल तर आधी सांगितल्याप्रमाणे केवळ स्वतःच्या मनोरंजनासाठी केलेली ती एक लीला आहे. माझ्याच घरी

**इति स्तुवति तस्मिंस्ते पालके बालरूपतः । स्थिता अप्याद्यरूपैः स्वैः स्थित्वोचुस्तं वरं वृणु ।।३५।।**
**स प्राह साध्वीं सुभगे ब्रह्मविष्णुमहेश्वराः । त्वद्भक्त्याप्ता मनोदूरा अतोऽभीष्टं वरं वृणु ।।३६।।**

इति तस्मिन् स्तुवति ते बाल+रूपतः पालके स्थिता अपि स्वैः आद्य+रूपैः स्थित्वा ऊचुः,'वरं वृणु'।३५। सः प्राह, '(हे) साध्वि, सुभगे, त्वत्+भक्त्या मनो+दूराः ब्रह्म+विष्णु+महेश्वराः आप्ताः। अतः अभीष्टं वरं वृणु।'।३६।

का याचे उत्तरही पूर्वीच्या लोकांत मी केलेले तप असे आले आहेच. जगात आपली भक्तवशता प्रकट करण्यासाठी, माझ्या तपाचे निमित्त करून आपण अवतरला आहांत. वास्तविक आपला कुणी अन्य निर्माता नाही (**निमित्त कारण**) की इतर कशापासून (**उपादान**) आपली उत्पत्ती नाही. आपणच भगवद्गीतेत सांगितल्यानुसार (२:२०) जन्ममरणादि विकार आपल्याला स्पर्शू शकत नाहीत. केवळ भक्तांवर कृपा करण्यासाठीच आपण स्वेच्छेने अवतार धारण करता.३४.

याप्रमाणे अत्रि महर्षी स्तुति करीत असतांनाच, पाळण्यात बालरूपांनी तसेच राहून ते तीनही भगवंत आपल्या मूळ रूपांनी मुनींसमोर उभे राहिले; आणि त्यांना 'इष्ट वर मागून घ्या,' असे म्हणाले.३५. याप्रमाणे त्या त्रैलोक्यवंदित देवांना आपल्यासमोर उपस्थित होऊन असे बोलतांना ऋषिवर्यांनी 'हा अनसूयेच्या पातिव्रत्याचाच प्रभाव आहे,' असा विचार करून ते त्या सतीला म्हणाले, 'हे सौभाग्यवती (ईश्वरांचे मातृत्व तिला प्राप्त झाल्याने हे संबोधन आहे), मनाला सुद्धा दुर्गम असे ब्रह्मा-विष्णू-महेश तुझ्या भक्तीने आपल्या घरी आले आहेत. (हे पार्था, तो परमपुरुष केवळ अनन्य भक्तीनेच लाभतो ह्या वचनानुसार (भ.गी. ८:२२) भक्तीच मुख्य कारण आहे.) तरी तू तुला हवा असलेला वर मागून घे.'३६.

**साऽप्याह सुतपः सृष्ट्यै त्रिधाभूतेन वै भवान् । सृष्टोऽमुनामुमेवातः पुत्रत्वेन वृणोत्वजम् ।।३७।।**
**ऋषिः सोऽपीदमेवेष्टं मत्वा वव्रे तदेव हि । विष्णुः सर्वात्मनाऽहं ते मया दत्तः किलाब्रवीत् ।।३८।।**
**पतिव्रताप्रभावोऽयं बाला भूत्वेश्वराः स्थिताः । स्वस्वप्राग्रूपतोऽप्येते स्वं स्वं स्थानं ययुस्त्रयः ।।३९।।**

सा अपि आह, '(हे) सुतप, त्रिधा+भूतेन अमुना सृष्ट्यै वै भवान् सृष्टः। अतः अमुं अजं एव पुत्रत्वेन वृणोतु'।३७। सः ऋषिः अपि इदं एव इष्टं मत्वा तत् एव हि वव्रे। विष्णुः अब्रवीत्, 'अहं सर्व+आत्मनः मया ते दत्तं किल'।३८। अयं पतिव्रता+प्रभावः। ईश्वराः बालाः भूत्वा स्थिताः अपि एते त्रयः स्व+स्व+प्राक्+रूपतः स्वं स्वं स्थानं ययुः।३९।

हे महर्षींचे वचन ऐकून 'हा खरोखर आपल्या पतीच्या तपाचाच प्रभाव आहे, माझी भक्ती आणि पातिव्रत्य यांचे काय महत्त्व?' असा विचार करून ती नम्रपणे बोलली, 'हे श्रेष्ठ तपस्विन्! (अत्रिमुनींचे तप ईश्वरोद्देशाने आणि सात्त्विकतेने केलेले असल्याने त्यांत कसलाही दोष (किल्मिष) नसल्याने इथे त्याला सुंदर (सात्त्विक) तप असे म्हटले आहे.) तीन रूपे धारण करणाऱ्या या परमेश्वरानेच आपल्याला प्रजोत्पादनासाठी निर्माण केले आहे. तरी जन्मादि भावातीत त्रयमूर्ति भगवंतालाच आपण पुत्ररूपाने मागून घ्यावे.' पुत्र हा गौण आत्माच असल्याने त्या रूपाने अवतरलेल्या भगवंताच्या कोड-कौतुक, आलिंगन-चुंबन इत्यादींनी मुख्य आत्म्याची प्राप्ती सुलभ व्हावी हाच त्या साध्वीचा भाव होता.३७. ऋष् म्हणजे गती. ज्याची अतीत (भूत), अनागत (भविष्य) आणि वर्तमान ह्या सर्व काळांत गती आहे, जो हे सर्व जाणूं शकतो तो **ऋषी**. अशा त्या अत्रि ऋषींनाही हे आपल्या पत्नीचे म्हणणे पटले आणि त्याप्रमाणे त्यांनी तोच वर (तीनही देवांनी आपले पुत्र व्हावे असा) मागून घेतला. त्यावर त्या सर्वव्यापी भगवंताने 'मी माझे स्वतःचे पूर्णत्वाने तुला दान करतो,' अशा शब्दात ते मान्य केले.३८. अशा रीतीने ते ब्रह्मा-विष्णू-महेश बालकांच्या रूपाने अनसूयेच्या पाळण्यात राहून आपल्या मूळ रूपांनी आपापल्या स्थानी - अनुक्रमे सत्यलोक, वैकुंठ आणि कैलास या लोकांना निघून गेले.३९.

**पृथङ्नामानि बालेभ्यो ददौ तेभ्योऽर्थविन्मुनिः । पूर्णत्वेन मयाऽहं ते दत्त इत्युक्तवान् स्वयम् ।।४०।।**
**भगवानिति नाम्नैनं मुनिर्दत्तं चकार सः । ब्रह्मांशं चन्दनाच्चन्द्रमौग्रं दुर्वाससन्तथा ।।४१।।**
**त्रयाणामप्ययं साक्षाद्दत्तस्तु भगवान्स्वयम् । श्रुत्यन्विष्टाङ्घ्रब्जरेणुः सच्चिदानन्दविग्रहः ।।४२।।**
**सदेष्टयोगसंविद्दः स्मर्तृगामी क्षणे क्षणे । चण्डोऽप्यन्योऽनुग्रहाशीश्चन्द्रो जननवर्धनः ।।४३।।**

अर्थ+वित् मुनिः तेभ्यः बालेभ्यः पृथक् नामानि ददौ। स्वयं भगवान्, 'अहं मया पूर्णत्वेन ते दत्तं' इति उक्तवान्।४०। एनं मुनिः नाम्ना दत्तं चकार। सः ब्रह्म+अंशं चन्दनात् चन्द्र तथा औग्रं दुर्वाससम् (नाम्ना चकार)।४१। त्रयाणां अपि दत्तः तु स्वयं श्रुति+अन्विष्ट+अङ्घ्रि+अब्ज+रेणुः सत्+चित्+आनन्द+विग्रहः साक्षात् स्वयं भगवान्।४२। सदा इष्ट+योग+संवित्+दः क्षणे क्षणे स्मर्तृगामी। अन्यः चण्डः अपि अनुग्रह+आशीः। चन्द्रः जनन+वर्धनः।४३।

नंतर शब्दांचे अर्थ जाणणाऱ्या त्या अत्रिमुनींनी त्या बालकांना त्यांच्या त्यांच्या गुणांची द्योतक अशी नावे दिली. 'मी सर्वांशाने तुला दिले आहे **(दत्तम्)**' असे म्हणणाऱ्या विष्णूंच्या अंशाला त्यांनी **दत्त** असेच नाव दिले. '*दत्तात्मा तु स्वयं दत्त*' असे याज्ञवल्क्यस्मृतीचे वचन आहे (व्यवहाराध्याय श्लोक १३१). अशीच शुनःशेपाला विश्वामित्राने दत्तक घेतल्याची गोष्ट आहे. पण तिथे शुनःशेपाचा पहिला जनक पिता होता त्यामुळे त्याला *'कृत्रिम वैश्वामित्र'* असे म्हणतात. हे दोन पित्यांचे *'द्व्यामुष्यायण'* दत्ताच्या ठिकाणी लागू होत नाही. कारण भगवान विष्णूंचा आधी कुणी पिता नव्हता. तसेच गोत्रप्रवरादि अस्तित्वातच नव्हते. ब्रह्मादेवाच्या अंशाला त्याच्या आल्हादकतेमुळे **(चंदन)** चंद्र असे नामाभिधान केले. तसेच उग्रस्वभावाच्या भगवान शंकाराच्या अंशाला **दुर्वास** असे नाव दिले.४०-४१. ह्या तिघांतही स्वतः दत्त, ज्याच्या पदकमलाच्या परागकणांचा श्रुति निरंतर शोध घेताहेत (पण ज्याना ते अजून सांपडले नाहीत) असा सच्चिदानंदस्वरूप साक्षात् परमेश्वर आहे. पदकमलाचे परागकण या शब्दाने जगताच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा निर्देश आहे, हे परब्रहाचे *'तटस्थलक्षण'* आहे. सत्, चित् आणि आनंद यांनी परब्रह्माचे *'स्वरूपलक्षण'* सुचविले आहे. हा दत्त सदैव अभीष्ट, अष्टांगयोग आणि ज्ञान यांचा दाता आहे आणि स्मरताक्षणी दर्शन देणारा आहे. दुर्वासमुनि रागीट स्वभावाचे असले तरी इतरांवर अनुग्रह करण्याचाच त्यांचा स्वभाव आहे. आणि चंद्र वंशवर्धक तसाच लोकांचे पोषण करणारा आहे.४२-४३.

**दुर्वासःशापमाश्रुत्य भूदेवार्थमनन्तशः । धृत्वावतारान्कार्यान्ते लीलाकायान्जहात्यजः ।।४४।।**
**परानुग्रहकार्यार्थमवतीर्णः स्वयं किल । दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वान्नामुमत्यजत् ।।४५।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कुतो दुर्वाससा शप्तः शापोऽव्यक्ते कथं वद । लग्नः परावरेऽमुं मे संशयं छेत्तुमर्हसि ।।४६।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**भक्ताधीनतया त्वेष भगवान् भक्तिभावनः । अव्यक्तोऽप्यस्ति सुव्यक्तः पूर्णाऽतोऽत्र सहिष्णुता ।।४७।।**

दुर्वासः शापं आश्रुत्य, अजः भू+देव+अर्थं अनन्तशः अवतारान् धृत्वा कार्य+अन्ते लीला+कायान् जहाति। पर+अनुग्रह+कार्य+अर्थं स्वयं किल अवतीर्णः। दत्तरूपेण कार्यस्य नित्यत्वात् अमुं न अत्यजत्।४४-४५। नामधारक उवाच। कुतो दुर्वाससा शप्तः? अव्यक्ते परावरे शापः कथं लग्नः? अमुं मे संशयं छेत्तुं अर्हसि।४६। एष भक्ति+भावनः भगवान् भक्त+अधीनतया अव्यक्तः अपि सुव्यक्तः अस्ति। अतः अत्र पूर्णा सहिष्णुता।४७।

दुर्वासमुनींच्या शापाचा अंगीकार करून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठी आणि देवांच्या कार्यासाठी हा अजन्मा अपरिमित अवतार धारण करतो आणि ती ती कार्ये झाल्यावर त्या त्या लीलाविग्रहांचे विसर्जन करतो. मात्र इतरांच्या अनुग्रहासाठी - मुमुक्षूंना मोक्षाची वाट दाखविण्यासाठी, भगवान विष्णूंनी स्वतः धारण केलेल्या ह्या दत्तावताराचे कार्य मात्र नित्य - न संपणारे असल्याने तो चिन्मय देह मात्र त्यांनी टाकलेला नाही.४४-४५. नामधारक प्रश्न करतात की 'ह्या कोणत्याही लक्षणानी अभिव्यक्तीला न येणाऱ्या आणि ब्रह्मादिकसुद्धा ज्याच्याहून निकृष्ट आहेत अशा परमात्म्याला दुर्वासांचा शाप लागला कसा हा माझा संशय आपणच फेडूं शकतां.'४६. सिद्ध म्हणाले, 'हा भगवान भक्तांच्या अधीन आहे. त्यामुळे वस्तुतः अव्यक्त असलेला हा भगवंत दया, क्षमा, शांती इत्यादि सर्व लक्षणे धारण करून व्यक्त होतो. त्यामुळेच भक्तवात्सल्याने त्याच्यात पूर्ण सहिष्णुता असते. भक्तांचे सर्व अपराध तो पोटात घेतो. प्रसंगी भक्ताचे क्लेश स्वतःवर घेतो पण त्यांना त्यांची झळ लागूं देत नाही.'४७.

**पुराम्बरीषनामैको भक्तो भागवतोत्तमः । एकादशीव्रतपर आसीदभ्यागतार्चकः ।।४८।।**
**एकदा व्रतभङ्गाय पारणाहे तदालयम् । चण्डः प्राप्याह दुर्वासा भोजनं मेऽर्पयेति च ।।४९।।**
**दास्यामीत्युक्तवत्यस्मिन्गत्वा स्नातुं नदीमरम् । छिद्रान्वेषी तत्र तस्थौ तरितुं पारणाक्षणम् ।।५०।।**
**सोऽप्यभुक्ते मुनौ भोज्यं नान्यथा व्रतभङ्गभीः । तीर्थात्तूभयसिद्धिर्मे इति मत्वा पपौ जलम् ।।५१।।**

पुरा अम्बरीष नाम एकः भागवत+उत्तमः एकादशी+व्रत+पर अभ्यागत+अर्चकः आसीत्।४८। एकदा चण्डः दुर्वासा पारणा+अहे व्रत+भङ्गाय तत्+आलये प्राप्य च आह, 'मे भोजनं अर्पय' इति।४९। अस्मिन् 'दास्यामि' इति उक्तवत् स्नातुं अरं नदीं गत्वा छिद्र+अन्वेषी तत्र पारणा+क्षणं तरितुं तस्थौ।५०। सः, 'मुनौ अभुक्ते न भोज्यं, अन्यथा व्रत+भङ्ग+भीः, तीर्थात् तु मे उभय+सिद्धिः' इति मत्वा जलं पपौ।५१।

पूर्वी अम्बरीष नांवाचा एक राजर्षि उत्तम भागवत (भगवद्भक्त) होता. आपल्या अंतरांत आणि सर्व भूतमात्रांत भगवंताचे दर्शन करणारा आणि आपल्यासह सर्व चराचर भगवंताच्या ठायीं आहे असे पाहणारा भागवतोत्तम होय. (*'सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः। भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः।।'* श्रीमद्भागवत ११:२:४५) तो निष्ठेने एकादशीव्रत करीत असे. दशमीला एकभुक्त राहून संकल्प करायचा, एकादशीला पूर्ण दिवसभर उपोषण करायचे आणि द्वादशीला नियत वेळेला पारणा करून पुनः उरलेल्या दिवसभर उपोषण करायचे असे ते व्रत. असे तीन दिवसांचे व्रत तो करीत असे. तसाच त्याचा घरी आलेल्या अतिथीला जेवण घालण्याचाही नियम होता.४८. एकदा त्याच्या व्रताचा भंग करण्याच्या हेतूने संतापी दुर्वासमुनी द्वादशीच्या दिवशी पारण्याला मुहूर्तभर (दिवसाचा ३०वा भाग; ४८ मिनिटे) असतांना आले आणि त्यांनी भोजनाची मागणी केली.४९. अम्बरीषाने ते मान्य केल्यावर ते स्नानासाठी नदीवर गेले. तिथे मुद्दामच पारण्याची वेळ टळावी ह्या हेतूनेच अंबरीषाच्या व्रतातील न्यून (छिद्र) शोधणाऱ्या ऋषींनी हत्तीप्रमाणे स्नान करीत विलंब केला.५०. इकडे मुनींना सोडून जेवता येत नाही आणि पारण्याचा मुहूर्तही चुकूं नये अशा शृंगापत्तीत सांपडलेल्या अंबरीषाने फक्त तीर्थजल प्राशन केले.५१.

**तदैत्याह मुनिः पीतं हित्वा मां क्षुधितं यतः। दुर्भगानेन दोषेण भ्रमिष्यसि भवे भवे ।।५२।।**
**इत्युक्तः सोऽप्यजं भीतो दध्यौ स्वकुलदैवतम् । स्वदासजीवनं विष्णुं सोप्यागत्याह तं मुनिम् ।।५३।।**
**मुने मोघं न ते वाक्यं शापं देहि तमेव मे । नायं सोढुं प्रभुर्भक्त-वात्सल्यान्मे सहिष्णुता ।।५४।।**

तदा मुनिः एत्य आह, '(हे) दुर्भग यतः मां क्षुधितं हित्वा पीतं, अनेन दोषेण भवे भवे भ्रमिष्यसि।'।५२। इति उक्तः सः अपि भीतः स्वकुलदैवतं अजं दध्यौ। स्वदासजीवनं विष्णुः सः अपि आगत्य तं मुनिं आह।५३। '(हे) मुने ते वाक्यं मोघं न। तं एव शापं मे देहि। अयं न सोढुं, मे भक्त+वात्सल्यात् सहिष्णुता।'।५४।

त्याच वेळी नदीहून परतलेल्या मुनींनी ते ओळखून त्याला शाप दिला. 'अरे करंट्या, मला उपाशी ठेवून जेवलास त्या पापाने तू पुनःपुन्हा विविध योनीत (मत्स्य, कूर्म, वराह, सिंह इत्यादि) जन्म घेऊन फिरत राहशील.' इथे कठोपनिषदातील मंत्राचा (१.१.८) निर्देश महाराजांनी केला आहे. ज्याच्या घरून ब्राह्मण उपाशी जातो असा दुर्बुद्ध, आपल्या आशा-अपेक्षा, सत्संग आणि आनंद, इष्टपूर्तादि पुण्यांचे फळ या सर्वांना मुकतो. यासाठी कोणत्याही परिस्थितीत अतिथीची उपेक्षा करू नये हाच या मंत्राचा भावार्थ आहे.५२. ह्या शापाने आता आपण पशुयोनीत गेल्याने आपल्याला भगवंताचे स्मरण राहणार नाही ह्या भयाने कासावीस झालेल्या त्या भागवतोत्तमाने आपले कुलदैवत भगवान विष्णू यांचे ध्यान केले. श्रीहरीही तत्क्षणी तिथे प्रकट झाले आणि दुर्वास ऋषींना म्हणाले,५३. 'ऋषि महाराज, आपल्या तपाच्या सामर्थ्याने आणि आपण सत्यसंकल्प असल्याने आपले वचन कधीच वाया जाणार नाही. पण हा एवढा भयंकर शाप ह्या माझ्या भक्ताला सोसणार नाही. अहो, हा तर मलाही सहन करणे दुरापास्त आहे; पण भक्तवात्सल्याने मी तो सोशीन. तेव्हां आपण तो शाप मलाच द्यावा.'५४.

**इत्याकर्ण्य मुनिर्मत्वा भुव्ययं दुर्लभो नृणाम् । अम्बरीषप्रभावेण शापसम्बन्धकारणात् ।।५५।।**
**भविष्यत्यत्र सुलभस्तच्छपाम्येनमित्यसौ । तं शशापाप्यजः शापाद् बहुधावतरत्यजः ।।५६।।**

इति आकर्ण्य मुनिः 'अयं भुवि नृणां दुर्लभः। अम्बरीष+प्रभावेण शाप+संबन्ध+कारणात् अत्र सुलभः भविष्यति। तत् एनं शपामि।' इति मत्वा असौ तं शशाप। अजः शापात् बहुधा अवतरति।५५-५६।

हे ऐकून दुर्वासांनी 'हा भूलोकातील मानवांना तपादि कठीण उपायांनीसुद्धा भेटत नाही. अंबरीषाच्या भक्तीसाठी आणि शापाच्या निमित्ताने हा ह्या भूलोकी सुलभ होईल. तरी मी यालाच हा शाप देतो,' असा विचार करून भगवंताला शाप दिला. आणि जन्मादि विकारांच्या अतीत असूनही नारायणाने मत्स्य, कूर्म इत्यादि रूपांनी पृथ्वीवर अवतार धारण केले.

विष्णूचे मत्स्यादि अवतार पुराणांतून वर्णिलेले आहेत.

१. चैत्र शुक्ल तृतीयेच्या अपराह्ण (माध्याह्नोत्तर) काळी मत्स्य रूपाने अवतरून समुद्रात बुडलेले वेद वर काढून मनूचे रक्षण केले.

२. वैशाखी पौर्णिमेला सायंकाळी कासवाचे रूप घेऊन समुद्रमंथनासाठी मंदार पर्वत पाठीवर घेतला. ३.

भाद्रपद शुक्ल तृतीयेच्या अपराह्णी वराहरूपाने समुद्रांतून पृथ्वी वर काढून हिरण्याक्षाचा संहार केला.

४. वैशाख शुक्ल चतुर्दशीला नरसिंहरूपाने अवतरून हिरण्यकश्यपूचा नाश केला.

५. भाद्रपद शुद्ध द्वादशीला माध्याह्नकाली वामनाचे रूप घेऊन कपटाने असुरराज बलीचे बंधन केले.

**अस्यावतारा मत्स्याद्याः पुराणोक्ता हि विश्रुताः । द्विवारमाविरासीत्स दीनान्त्रातुं जनान् कलौ ।।५७।।**
**अद्यापि तौ कामदौ स्तः पामरागोचरौ कलौ । यतकालकलौ द्राक्शं सिद्ध्येन्नान्यदतोऽवितः ।।५८।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

अस्य मत्स्य आदि पुराण+उक्ताः अवताराः हि विश्रुताः। कलौ दीनान् जनान् त्रातुं द्विवारं आविरासीत्।५७। कलौ पामर+अगोचरौ तौ कामदौ अद्यापि स्तः। यत+काल+कलौ शं द्राक् सिद्ध्येत् न अन्यत्। अतः (सः कलिः।) अवितः।५८।

६. वैशाख शुक्ल तृतीयेच्या माध्याह्नकाली कार्तवीर्यादि क्षत्रियांचा संहार करण्यासाठी परशुराम भार्गवाचा अवतार घेतला.

७. चैत्र शुक्ल नवमीला दशरथाच्या पोटी रामाचा अवतार घेऊन रावणाचा कुळासहित नाश केला. ८.

श्रावण कृष्ण अष्टमीला मध्यरात्री अवतरून श्रीकृष्णाने भूमीचा भार हलका केला. ९. आश्विन शुक्ल दशमीला बुद्धाचा अवतार घेऊन कारुण्याचा प्रसार केला. १०. श्रावण शुक्ल षष्ठीला कल्कीचा जन्म होईल आणि तो म्लेच्छांचा नाश करील. हे दहा अवतार होत.५५-५६. कलियुगांत झालेल्या अवतारांविषयी पुढच्या श्लोकांत सांगितले आहे.

मार्गशीर्ष पौर्णिमेला प्रदोषकाळी बुधवारी मृगनक्षत्रावर श्रीदत्तात्रेयांचा अवतार आजही गाजतो आहे. ह्या दत्तप्रभूंचेच श्रीपाद आणि नरहरि या नांवांचे दोन अवतार कलियुगांतील दीनदुबळ्यांच्या उद्धारासाठी झाले आहेत. पामरांना दिसत नसले तरी ते आजही ते भक्तांच्या कामना पूर्ण करीत विद्यमान आहेत.

(तर मग ते सकल दोषांनी भरलेल्या या क्रूर कलीचा नाश का करीत नाहीत ही शंका अपेक्षून सांगत आहेत.)

ब्रह्मदेवाच्या योजनेने त्याला नेमून दिलेल्या काळाचा विचार करून आणि त्या युगांत पुण्याचा लाभ सुलभ आणि लवकर (केवळ संकल्पाने) होत असल्याने तसेच संकल्पाने पाप मात्र लागत नसल्याने तो कितीही दुष्ट असला तरी त्याला राखला आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तिसरा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अध्याय ४ ।।

### ।। यदुरुवाच ।।

**श्र्यायुःकीर्त्यृद्धिहेतुर्ना न्त्रर्थसक्तोऽन्यथा भवान् । कल्पः स्वङ्गो ज्ञोऽप्यकर्ता कुतोऽत्रातृट् समुत्विति ।।१।।**

ना श्री+आयुः+कीर्ति+ऋद्धि+हेतुः नृ+अर्थ+सक्तः। भवान् अन्यथा। कल्पः सु+अङ्गः ज्ञः अपि अकर्ता, अतृट्, अत्र कुतः समुत् इति।१।

(श्रीगुरुचरित्राला अभिप्रेत दत्तसंप्रदायाची मूलतत्त्वे विस्ताराने मांडून त्याची सांगड श्रीमद्भागवत संप्रदायाशी घालण्याचे कार्यही श्रीस्वामिमहाराजांनी प्रस्तुत ग्रंथाद्वारे केले आहे. त्यासाठी आवश्यक तेथे श्रीगुरुचरित्रात नसलेल्या विषयांचा समावेश त्यांनी ह्या द्विसाहस्री गुरुचरितम् ग्रंथात केला आहे. अर्थात् हे विषय आगंतुक आहेत ही जाणीव असल्याने त्या त्या ठिकाणी त्या लोकांना त्यांनी 'क्षेपक' म्हटले आहे. हा संपूर्ण चौथा अध्याय मूळ गुरुचरित्रात नाही. त्यामुळे त्यांनी त्याला क्षेपकोऽध्यायः असे म्हटले आहे. मूळ गुरुचरित्रात श्रीदत्तजन्माची कथा सोडून इतर दत्तचरित्राचा फारसा उल्लेख आढळत नाही. श्रीगुरु नृसिंहसरस्वतींना त्रयमूर्ति असे विशेषण गुरुचरित्रात बऱ्याच ठिकाणी लावले आहे तेवढेच.

दत्तावताराच्या कार्याची, तत्त्वज्ञानाची आणि उपासनापद्धतीची संगती गुरुचरित्रातील प्रतिपादनाशी लावून त्याला बळकटी देण्याचे कार्य प.प. श्रीटेंबेस्वामिमहाराजांनीच प्रथम केले आहे. द्विसाहस्रीतील हा चौथा क्षेपक अध्याय त्या कार्याला पायाभूत आहे. ह्या अध्यायांतील ३ ते ४० हे ३८ लोक जसेच्या तसे श्रीदत्तपुराणात (६:५:९-४६) आणि श्रीदत्तात्रेयषोडषावतारचरित्रात (१५:८-४५) दिले आहेत. ह्या ३८ लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणाच्या टीकेत **'श्रीअवधूतगीता'** असे नांव दिले आहे. ह्या आख्यानावर श्रीमद्भागवतांतील एकादश स्कंधांतील ७व्या अध्यायातील यदु-अवधूत संवादाची छाप स्पष्टपणे दिसून येते. - अनुवादक)

**श्रीदत्तो यदुना पृष्टस्तं पुंसां श्रेयसेऽब्रवीत् । परं ध्युपाश्रितगुरु-शिक्षितज्ञानमात्मनः ।।२।।**

श्रीदत्तः यदुना पृष्टः तं पुंसां श्रेयसे आत्मनः परं धी+उपाश्रित+गुरु+शिक्षित+ज्ञानं अब्रवीत्।२।

श्रीगणेशाय नमः। चतुर्थाध्याय. आत्मविद्येचे निरूपण करण्यासाठी त्याला पुष्टी देणारे असे ब्रह्मज्ञानाचे उपदेशात्मक उपाख्यान ह्या अध्यायात सांगितले आहे. हे ब्रह्मसूत्रातील पारिप्लवाधिकरणाला (११:४:२३) अनुसरूनच आहे. उपनिषदांत याज्ञवल्क्य-मैत्रेयी, प्रतर्दन, जनश्रुति इत्यादींच्या अनेक कथा (उपाख्याने) सांगितल्या आहेत. ह्यासंबधी कुणी असे म्हणेल की ह्या अश्वमेधादि यज्ञात ऋत्विजांनी यजमानाला मधूनमधून कांही कथा सांगण्याचे विधान आहे. ह्या कथा केवळ त्या विधीचा भाग म्हणजे उपचारात्मक असतात. त्याला परिप्लव म्हणतात. त्याचप्रमाणे उपनिषदात आलेल्या ह्या गोष्टी औपचारिक मानायच्या काय? असा प्रश्न (पूर्वपक्ष) उपस्थित करून ह्या अधिकरणात त्याचे नकारार्थी उत्तर दिले आहे. पुढे असे स्पष्ट केले आहे की या कथा आत्मविद्येच्या प्रतिपादनाशी संबंधित असून त्याचा अंगभूत घटक आहेत. श्रीस्वामिमहाराजांना इथे हे सुचवायचे आहे की यदु आणि अवधूत यांची ही कथाही ह्या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय जो आत्मज्ञान त्याचाच परिपोष करीत आहेत. पर्यायाने श्रीगुरुचरित्रात आलेल्या सर्वच गोष्टी आत्मज्ञानाच्या उपदेशाचाच भाग आहेत असे सुचविले आहे. त्यांच्याकडे केवळ कांही प्रसंगोपात्त कथा असे न पाहता त्यांतील निर्दिष्ट तत्त्वज्ञानाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. **चोवीस गुरूंकडून शिकलेले ज्ञान। यदुराया अवधूत निरूपी जाण। तेवींच प्रल्हाद आणि अर्जुन। बोधिले अनसूयानंदने।।४।।** पित्याच्या शापाने वडिलोपार्जित राज्यापासून वंचित झालेला ययातिपुत्र यदु विरक्त होऊन वनांत संचार करीत असतां त्याने एका निर्मनुष्य स्थानी एका सर्वसंगपरित्याग केलेल्या, एका ब्राह्मण अवधूताला भूमीवर झोपलेले पाहिले. तिथे निश्चिंत, भयरहित आणि तरीही सावध (अंतर्मुख) अशा त्या अवधूताला पाहून यदुने आश्चर्याने त्याला प्रश्न केला.

**न दैवानुगभूतार्तः क्षमेव धीरः सृतेश्चलेत् । सदा परार्थोद्भवेहो नगाच्छिक्षेत्परात्मताम् ।।३।।**

दैव+अनुग+भूत+आर्तः क्षमा+इव धीरः सृतेः न चलेत्। पर+अर्थ+उद्भवः नगात् परात्मतां शिक्षेत्।३।

'महाराज! साधारणतः मानवाची प्रवृत्ती संपत्ती, आयुष्य, कीर्ती यांच्या समृद्धीसाठी धर्म, अर्थ, काम आदि पुरुषार्थाकडे असते. आपल्याला मात्र ह्या कशाचीही इच्छा दिसत नाही. तसेच आपण धर्मादि पुरुषार्थाविषयी उदासीन आहां. आपण धडधाकट, ज्ञानी आणि हुषार दिसता. तेव्हा आपल्यात कर्तृत्वच नाही असेही नाही. आपण निरिच्छपणे, पत्नी, पुत्र इत्यादि कांहीच संसार नसूनही पूर्ण आनंदात इथे पहुडलेले दिसतां. हे कसे काय?'

ययातिपुत्र यदूचा हा प्रन ऐकून श्रीदत्तप्रभूंनी आपल्याच बुद्धीने स्वीकारलेल्या चोवीस गुरूंपासून प्राप्त केलेले हेय आणि उपादेय - म्हणजेच त्याज्य आणि ग्राह्य असे दोन्ही प्रकारचे भ्रम आणि प्रमाद यांचा निरास करणारे उत्कृष्ट ज्ञान मानवांच्या उद्धारासाठी सांगायला आरंभ केला. *'सन्ति मे गुरवो राजन् बहवो बद्ध्युपाश्रिताः। यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु।।'* (भा.पु. ११:७:३२)

**१. पृथ्वी -** त्यांतही तितिक्षेचे परमार्थमार्गातील प्राधान्य लक्षात घेऊन आधी पृथ्वीपासून घेतलेली शिकवण सांगतात. आपापल्या कर्माला अनुसरून पृथ्वीवर वावरणारे जीव तिच्यावर सतत आघात करीत असतात; खणणे, नांगरणे, मलमूत्रादि विसर्जणे, पायाने तुडविणे इत्यादि नानाप्रकारे तिला सतत हे सर्व प्राणीमात्र त्रस्त करीत असतात. पण पृथ्वी मात्र त्या सर्वांना आधार देत आपल्या मार्गावर अविचल राहते. 'हे सर्व जीव आपापल्या दैवाप्रमाणे घडलेले आहेत आणि त्याचप्रमाणे ते वागतात. तेव्हां कुणाला काय म्हणून दोष द्यावा?' असा विचार ती करते. पृथ्वीपासून हे धैर्य आणि क्षमाशीलता मी शिकलो आहे. शास्त्रांत तीन प्रकारचे प्रारब्ध सांगितले आहे. स्वेच्छा प्रारब्ध, परेच्छा प्रारब्ध आणि अनिच्छा प्रारब्ध. यापैकी कोणत्याही प्रकारे समोर येणारे प्रारब्ध हे आपलेच कर्म आहे असा विचार करून कुणावरही राग धरू नये.

**प्राणवृत्त्याक्षिप्तहृद्वाग्विद्भृत्तुष्येन्न गोप्रियैः । तद्भुग्दोषगुणास्पृग्वि-धर्मासक्तच देहगः ।।४।।**

वित्+भृत् प्राणवृत्त्या अक्षिप्त+हृत्+वाक् तुष्येत्, न गो+प्रियैः। देह+गः तत्+भुक् वि+धर्म+असक्तः दोष+गुण+अस्पृक् गुण+आश्रयः स्वदृक्, गन्धैः वायुवत् गुणैः न युज्येत्।४।

**नग** पृथ्वीचेच अंगभूत असे जे पर्वत किंवा वृक्ष, त्यांच्यापासून इतरांच्या सुखासाठीच सर्वस्व वेंचायला मी शिकलो. **पर्वत** आणि वृक्ष यांची उत्पत्तीच जणू परोपकारासाठी झालेली असते. पर्वत आपली माती, जल, खनिज, रत्नादि संपत्ती इतरांसाठीच देतात. त्याचप्रमाणे **वृक्ष**ही त्यांना लावणारा, तोडणारा, अथवा उपटून टाकणारा असा जो कोणी त्यांचा आश्रय घेतो त्याला आपली पाने फुले, फळे, छाया आणि लाकूडसुद्धा निरपेक्षपणे अर्पण करतात. (जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयाने केली। दोघां एकचि साउली। वृक्ष दे जैसा।। ज्ञानेश्वरी १:१९९). *'भूतैराक्रम्यमाणोऽपि, धीरो दैववाशनुगैः। तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम्।। शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः। साधुः शिक्षेत भूभृत्तौ, नगशिष्यः परात्मताम्।।'* भा.पु. ११:७:३७-३८.

**२. वायू -** क्षमाशील मनुष्याला आंतरिक शांती लाभते हे खरे असले तरी मनाला विषयांची ओढ असेल तर ते बहिर्मुख होण्याचीच शक्यता आहे. चित्ताला अंतर्मुखता येण्यासाठी देहाच्या आंतील आणि बाहेरील वायूपासून घेतलेले विषयांसंबंधी अनासक्तीचे शिक्षण सांगतात. शरीरांतील प्राणवायू जसा चव-बेचव असा विचार न करता जे अन्न मिळेल त्यावर निर्वाह करतो त्याचप्रमाणे शहाण्या माणसानेही मिळेल त्या आहाराने समाधान मानून रुचीकडे लक्ष देऊं नये. जिभेचे चोचले पुरवण्याची धडपड करून मनाचा क्षोभ होऊ देऊ नये. प्राणवृत्तीचा अवलंब करून आहार घेतला नाही तर मनाला विकलता येईल आणि ज्ञान टिकवता येणार नाही; रुचीचा आग्रह धरला तर मन आणि वाचा अशांत होतील. (*'प्राणवृत्त्यैव संतुष्येन्मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः। ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः।।'* भा.पु. ११:७:३९।।)

**गुणाश्रयो गुणैर्युज्येत्र गन्धैर्वायुवत्स्वदृक् । कालोत्थगुणतेजोऽब्भू-मयभावास्पृगित्पुमान् ।।५।।**
**वायूत्थाब्दास्पृक्खवच्चान्तःस्थेनाभिदसङ्गती । भाव्ये सर्वान्वयव्याप्त्या ब्रह्मात्मत्वात्ततात्मनः ।।६।।**

पुमान् वायु+उत्थ+अब्द+अस्पृक् काल+उत्थ+गुण+तेजः+अप्+भूमय+अस्पृक ख+वत्। आत्मनः सर्व+अन्वय+व्याप्त्या ब्रह्म+आत्मत्वात् अन्तःस्थेन अभित्+असङ्गती भाव्ये।६।

बाह्य वायू जसा सर्वत्र संचार करीत असतां सुगंधी उपवनांतून वा दुर्गंधयुक्त उकिरड्यावरून, हिमाच्छादित पर्वतराजीवरून वा धगधगणाऱ्या आगीतून जात असता त्यांचे सुगंध-दुर्गंध, शीतलता-उष्णता हे विविध धर्म स्वतःला फार काळ चिकटू देत नाही, त्याचप्रमाणे योगी प्राप्त विषयांचा भोग घेऊनही त्यांच्याविषयी आसक्ती ठेवीत नाही. (*'विषयेश्वाविशन्योगी नानाधर्मेषु वर्ततः। गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत्।।'* भा.पु.११:७:४०।।)

ह्या स्थूल देहात राहून तेथे विषयांचा उपभोग घेतांना जरी तो योगी दिसला तरी गंधादीपासून अलिप्त असणाऱ्या वायूसारखा अनासक्त राहतो. *'पार्थिवेष्विव देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः। गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक्।।'* भा.पु. ११:७:४१. हे असे कसे होईल ह्या प्रनाचे उत्तर दिले आहे. **स्व** म्हणजे आत्मा त्याच्यावर दृष्टी (दृक्) लावून म्हणजे आत्मानुसंधानाने हे शक्य होते.

**३. आकाश -** अशा आत्मचिंतनशीलाचेही चित्त निर्विकार, व्यापक अशा आत्म्याचे ज्ञान नसेल तर स्वस्थ राहणार नाही. त्यासाठी आकाशापासून घेतलेला धडा श्लोकाच्या उत्तरार्धात सांगितला आहे. काळाने निर्माण केलेले वायू, तेज, जल यांच्या मिश्रणाने झालेल्या मेघांनी जसे आकाश लिप्त होत नाही तसा ज्ञानी पुरुषाला पंचीकृत भूतांपासून झालेल्या देहाच्या विकारांचा स्पर्शही होत नाही. *'तेजोऽब्वन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः। न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान्।।'* भा.पु. ११:७:४३.

**रस्यः स्निग्धः प्रकृत्याच्छो ज्ञोऽब्वद्धाम्ना पुनाति नॄन् ।**
**छन्नः स्पष्टोऽपि काम्यर्च्यः प्रागुदग्दात्रघं दहन् ।।७।।**
**क्वापि भुङ्क्ते तपस्तेजो-दीप्तोऽक्षोभ्योऽपरिग्रहः । मलास्पृक्सर्वभक्षोऽपि ज्ञोऽग्निवच्चेन्धसीयते ।।८।।**
**तत्तद्रूपः स्वमायोत्थोच्चासत्स्थेशोऽग्निहेतिवत् । कालान्नित्येऽपि दृश्येते नात्मभूतोद्भवक्षती ।।९।।**

रस्यः स्निग्धः प्रकृत्या अच्छः अप्+वत् ज्ञः नॄन् पुनाति। अग्निवत् छन्नः स्पष्टः अपि प्राक् उदक् दातृ+अघं दहन् कामी+अर्च्यः।७। अक्षोभ्यः अपिरग्रहः मल+अस्पृक् क्व अपि भुङ्क्ते। सर्व+भक्षः अपि ज्ञः तपः+तेजः+दीप्तः। इन्धसि इयते । स्व+माया+उत्थ+उच्च+असत्+स्थः ईशः च (तत्तत्रूपः इयते)। कालात् नित्ये अपि आत्म+भूत+उद्भव+क्षती न दृश्येते।८-९।

आणखी घटाकाश, मठाकाश इत्यादी वेगवेगळ्या स्वरूपांत भासले तरी आकाश सर्वव्यापी असल्याने घटादिकांनी ते भिन्न होत नाही किंवा त्यांच्याशी आकाशाचा संबंध नसतो. घटादिकांच्या फुटण्याने आकाशाला काहीच हानी पोंचत नाही. त्याचप्रमाणे देहस्थ प्रत्यगात्मा सर्वव्यापी असल्याने आणि ब्रह्मस्वरूपच असल्याने त्याचा देहादिकांशी संबंध नसतो किंवा त्यांच्यामुळे त्याचे भेदही होत नाहीत. श्रीस्वामिमहाराज आकाशाची व्यापकता माळेतील मण्यांत असलेल्या दोऱ्याच्या व्यापकतेपेक्षा वेगळी असल्याचे स्पष्ट करतात. दोरा मण्यापासून वेगळा करता येतो. आकाश मात्र वेगळे होत नाही. सर्व चराचरांना ते अंतर्बाह्य व्यापून असते. सर्व चराचरांच्या अंतर्बाह्य स्थित असून विच्छिन्न न होता, सर्वांशी समन्वय करूनही निर्लिप्त राहण्याची शिकवण आकाशाकडून घ्यावी हा अभिप्राय. *‘अंतर्हितश्च स्थिरजङ्गमेषु ब्रह्मात्वभावेन समन्वयेन। व्याप्त्याऽवच्छेदमसङ्गमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत्।।’* भा.पु. ११:७:४२.

**४. उदक -** ज्ञानी जलाप्रमाणे, मधुर(भाषी), लाघवी आणि स्वभावतः स्वच्छ असतो. पाण्यासारखाच आपल्या दर्शनाने, स्पर्शाने आणि सेवनाने लोकांच्या काया आणि मने पवित्र करतो. *स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम्। मुनिः पुनत्यपां मित्रमीक्षोपस्पर्शकीर्तनैः।।’* भा.पु.११:७:४४. पुढील अडीच श्लोकात अग्नीपासून शिकलेले ज्ञान सांगतात.

**देहः कलावद्विकारी कालेनात्माब्जवद् ध्रुवः । भात्यात्मा तत्स्थद्व्यक्तौ न स्वस्थो बुध्यतेऽर्कवत् ।।१०।।**

देहः कालेन कला+वत् विकारी, आत्मा अब्ज+वत् ध्रुवः। अर्क+वत् आत्मा (स्थूल+बुद्ध्या) व्यक्तौ तत्स्थ+वत् भाति स्वस्थः न बुद्ध्यते।१०।

**५. अग्नि -** अग्नीसारखा योगी कधी गुप्त (राखेने झांकलेला) तर कधी स्पष्ट धगधगता, सकाम भक्तांची (होत्यांची) पूजा घेतो आणि दात्याची मागची-पुढची सगळी पापे जाळतो. *'क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्टः उपास्यः श्रेय इच्छिताम्। भुङ्क्ते सर्वत्र दातॄणां दहन् प्रागुत्तराशुभम्।।'* भा.पु. ११:७:४६. अग्नीसारखाच सर्व भक्षण करूनही त्याला मळ (दोष) लागत नाही. तपाच्या तेजाने तो अग्नीसारखा प्रदीप्त असल्याने त्याला कोणत्याही कारणाने क्षोभ होत नाही. अग्नी जसा सर्व जाळून टाकून कांहीच शिल्लक ठेवीत नाही तसाच ज्ञानीही कशाचा संग्रह करीत नाही. अग्नी ज्या ज्या इंधनात प्रवेश करतो त्याचाच आकार घेतो. गोल लाकडाला जाळतांना तो गोल दिसतो तर चौकोनी ठोकळ्याला जाळतांना तो चौकोनी दिसेल. तसाच आत्मा आपल्याच मायेने निर्मिलेल्या देव, प्राणी, मनुष्य इत्यादी देहांत प्रविष्ट होऊन त्यांच्यासारखाच भासतो. पण त्याला स्वतःला कोणताही आकार नसतो. तसेच दिव्याची ज्योती नित्य नवी प्रकाशते आणि मालवते. असे असूनही तिची उत्पत्ती अथवा नाश स्थूल दृष्टीला दिसून येत नाही. ती सतत तेवतांनाच दिसते. तशीच सतत जन्मणाऱ्या आणि नष्ट होणाऱ्या नाशिवंत देहांची क्षणभंगुरता काळाच्या वेगाने माणसाला जाणवत नाही. *'स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः। प्रविष्ट ईयते तत्तत्सरूपोऽग्निरिवैन्धसि।।'* भा.पु. ११:७:४७. 'कालेन क्षोभवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ। नित्यावपि न दृयेते आत्मनोऽग्नेर्यथार्चिषाम्।।' भा.पु.११:७:४९.

**६ चंद्र -** जन्म, स्थिती, वाढ, परिणाम, झीज आणि नाश ह्या सहा विकार असलेल्या देहापासूनही आत्मा वेगळा आहे हे चंद्रापासून घेतलेले ज्ञान पहिल्या श्लोकार्धात सांगितले आहे. देह हा चंद्राच्या कलांप्रमाणे विकारशील आहे; आत्मा मात्र चंद्रासारखा अविकारी आहे. ज्योतिष्यशास्त्रानुसार सूर्य तेजाचा गोलक आहे तर ग्रह आणि नक्षत्रे जलाचे गोल आहेत.

**स्थूलबुद्ध्याऽर्कवद्गोभिर्-गा यथास्वं गुणैर्गुणान् । आदत्ते विसृजत्यत्र सदा योगी न युज्यते ।।११।।**

(स्थूलबुद्ध्या)। यथास्वं गोभिः गाः अर्कवत् योगी गुणैः गुणान् आदत्ते विसृजति सदा न युज्यते।११।

जलमय चंद्र आणि तेजोमय सूर्य जेव्हा एका नक्षत्रात असतात तेव्हा चंद्र सूर्याने झांकल्यामुळे डोळ्याना दिसत नाही. एका नक्षत्रापासून दुसऱ्या नक्षत्राला जायला चंद्राला साठ कला ओलांडाव्या सागतात तर सूर्याला तेरा दिवस आणि रात्री लागतात. म्हणजे (मानवाच्या दृष्टीने) चंद्राचा वेग सूर्याच्या १५ पट आहे. प्रतिपदेला सूर्याचा पंधरावा भागच चंद्राच्या जलांत प्रतिबिंबित होतो. पंधराव्या दिवशी चंद्र आणि सूर्य यांच्यातील अंतर १३ नक्षत्रांचे होते. म्हणजेच २७ नक्षत्रांच्या मंडलात चंद्र आणि सूर्य समांतर होऊन एकमेकांसमोर येतात. म्हणून त्या (पौर्णिमेच्या) दिवशी संपूर्ण सूर्याचे प्रतिबिंब, त्यावर पडलेल्या पृथ्वीच्या सांवलीसहित दिसते. अमावास्या धरून हे चक्र सोळा दिवसांचे होते आणि ह्या काळांत चंद्राचे प्रतिबिंब एकेका कलेने वाढते. अशा सोळा कला होतात. नंतर पुन्हा प्रतिपदेपासून चंद्र आणि सूर्य एकमेकांजवळ येतात आणि चंद्रात उमटणारे प्रतिबिंब एकेका कलेने कमी होत पुढच्या अमावास्येला दिसेनासे होते. ह्या सर्व प्रक्रियेत जलगोलक चंद्राचा आकार कमी-जास्ती होत नाही. तो विकार फक्त कलांचाच आहे. तसेच आत्म्याचे पण आहे. आत्मा देहस्थ भासत असला तरी देहाचे विकार त्याला स्पर्शत नाहीत. पुढच्या अर्ध्या श्लोकात सूर्यापासून काय शिकलो ते सांगतात. *'विसर्गाद्याः स्मशानान्ता भावा देहस्य नात्मनः। कलानामिव चन्द्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मनः।।४८।।'* भा.पु. ११:७:४८.

**७. सूर्य -** स्वतः भेदरहित असूनही तो स्वरूपात स्थित आहे हे न कळून अभिव्यक्त स्थूल देहात असल्यासारखा भासतो. जसा सूर्य स्वर्गात (आकाशात) अविचल असतो पण घागरीतील पाण्यात हलताना दिसतो तसा स्थूल देहाच्या विकारानी आत्मा विकृत झाल्यासारखा वाटतो. *'सूर्यो थिल्लरामाजी (डबक्यात) बिंबला। मूढ म्हणती थिल्लरी बुडाला। त्याचेनि कंपे कंपु मानिला। डहुळला म्हणता तो।।५१।। त्या थिल्लराते नातळतां। गगनीं अलिप्त जेवीं सविता। तैसीच योगियांची योग्यता। देहातीतता देहकर्मी।।५२।।'* ए. भागवत. अ. ७.

**नाऽतिस्नेहप्रसङ्गात्तो नश्येद्दीनः कपोतवत् । कश्चित्कपोतः कपोती क्रीडादौ चेरतुर्वने ॥१२॥**
**प्रेम्णाऽशङ्कं मिथोबद्धध्यक्षङ्गौ पाति स श्रमात् । तर्पयन्ती साऽसूतार्भांस्-तांस्तौ पुपुषतुर्मुदा ॥१३॥**

ना अति+स्नेह+प्रसंगात् दीनः कपोतवत् नश्येत्। कश्चित् कपोतः कपोती क्रीडा+आदौ प्रेम्णा अशङ्कं धी+अक्ष+अङ्गौ मिथः वने चेरतुः। सः श्रमात् तर्पयन्तीं कपोतीं पाति। सा अर्भान् असूत। तां तौ (च सः) मुदा पुपुषतुः।१२-१३।

योग्य वेळी सूर्य जसा आपल्या किरणांनी (***गोभिः***) पाणी (***गा***) शोषून घेतो आणि पावसाळ्यांत पुनः ते पाणी सोडतो, तसाच योगी त्या त्या वेळी इंद्रियांद्वारा (**गुणैः**) विषय (**गुणाः**) ग्रहण करतो आणि कालानुसार आणि पात्रानुसार ते विषय दुसऱ्यांना देतो. या दोन्ही क्रियांचा तो अभिमान बाळगीत नाही. *'गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विसृजति। न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपति॥'* भा.पु. ११:७:५०.

**८. कपोत-कपोती -** वरीलप्रमाणे देहातीततेचा अभ्यास केला तरी जर कोणाचाही अतिरिक्त स्नेह त्याच्या नाशालाच कारण होतो हे कपोतापासून घेतलेले हेयलक्षण शिक्षण चार श्लोकांत सांगतात. माणूस (**ना**) (स्त्रीपुत्रादिकांच्या) फारच प्रेमात अडकून त्यांचे कोड कौतुक करू जाईल तर तो पारव्यासारखा विवश होऊन नाश पावेल. एका वनात एक पारवा (कवडा) आणि त्याची मादी जोडीने आपली मने, दृष्टी आणि शरीरे (**धी, अक्षि, अंगौ**) एकमेकाशी गुंतवून (**मिथः**) निरतिशय प्रीतीने विहार करीत होते. हास्य, कटाक्ष आणि आलाप यांनी त्याला सुखविणाऱ्या त्या कपोतीला हवे ते कष्टाने देऊन तो कपोत तिचा सांभाळ करीत होता. यथाकाल त्या कपोतीने अंडी दिली आणि कालांतराने ती फुटून पिले बाहेर आली.

**कदाचिल्लुब्धको नीडाद् बहिःस्थांस्ताञ्छिचाददे । क्रोशन्तीं पतितां दुःखात्-तां तं चापस्मृतिं तथा ।।१४।।**
**द्वन्द्वारामः प्रियाऽशान्तो गृहासक्तो विवन्नरः । क्रान्तापावृतमुक्तिद्वार्-नृजन्मच्युत एव सः ।।१५।।**

कदाचित् लुब्धकः नीडात् बहिःस्थान् तान् शिचा आददे। तां दुःखात् पतितां तथा तं च अपस्मृतिं (लुब्धकः आददे)।१४।
द्वन्द्व+आरामः प्रिय+अशान्तः गृहा+आसक्तः नरः सः विवत् अपावृत+मुक्ति+द्वाः+नृ+जन्म+च्युत एव।१५।

त्यांच्यासाठी केलेल्या इवल्याशा घरटांत त्याना सुरक्षित ठेवून ते दोघे त्यांच्यासाठी चारा आणीत आणि त्यांच्या मुखांत घालीत. अशा रीतीने त्यांचे लालन-पालन होत असतांना ही पिले थोडी मोठी झाली आणि घरट्याच्या जवळपास खेळू लागली. आईवडील बाहेर चारा आणायला गेले असतांना याप्रमाणे तिथे खेळणारी पिले एका फांसेपारध्याने (**लुब्धकः**) टिपली. त्याने आपले जाळे (**शिचा**) लावून त्या पिलांना धरले आणि तो त्यांच्या मातापित्यांची वाट पाहू लागला. वनांतून परत आलेली कपोती, आपल्या पिलांची ती अवस्था पाहून दुःखातिशयाने चीत्कार करीत जाळ्यांत पडली. मागून येणाऱ्या कपोताने हे सर्व जाळ्यांत सांपडलेले पाहून हतबुद्ध आणि गलितगात्र झाला आणि त्यालाही त्या फांसेपारध्याने पकडले. (भागवतांत (११:७:५२-७३) हे कपोत-कपोतीचे गृहस्थाश्रमावरील रूपक अधिक विस्ताराने सांगितले आहे. एकनाथमहाराजांनीही ते सुंदररीत्या रंगविले आहे.)

असा दृष्टान्त मांडून झाल्यावर आतां तो दार्ष्टान्तिक जो पुरुष त्याला लावतात. द्वंद्वांत सुख शोधणारा, प्रिय विषयाच्या लालसेने अशान्त झालेला, घर हेच आनंदाचे धाम आहे अशा बुद्धीने त्यांत आसक्त झालेला पुरुष असाच काळाचे भक्ष्य होतो आणि जणू मुक्तीचे उघडे दार, असा हा दुर्लभ नरजन्म कुटुम्बपोषणातच व्यर्थ गमावून बसतो. परिणामी हीनतर योनीत जन्म घेतो असा भावार्थ. (*'एवं कुटुम्ब्यशान्तात्मा, द्वन्द्वारामः पतत्रिवत्। पुष्णन्कुटुम्बं कृपणः सानुबन्धोऽवसीदति।।७३।। यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम्। गृहेषु खगवत्सक्तस्तमारूढच्युतं विदुः।।७४।।'* भा.पु. ११:७.)

**क्वाप्यस्त्यैन्द्रियसौख्यं तन्-नैच्छेदाजगरोऽक्रियः । यदृच्छयाप्तं महान्तं ग्रासं वाल्पं रसारसम् ।।१६।।**
**भक्षेच्चेन्नाप्तोऽनशनो दैवभुक्सर्पवत्स्वपन् । विनिद्रोऽक्रियबल्यङ्ग-धृग्गोमानपि नेहते ।।१७।।**

क्व अपि ऐन्द्रिय+सौख्यं आजगरः अक्रियः तत् न ऐच्छेत्। यदृच्छया आप्तं महान्तं वा अल्पं रस+अरसं ग्रासं भक्षेत्। न आप्तः चेत् अनशनः दैवभुक् स्वपन् विनिद्रः अक्रियः बली+अङ्ग+धृक् गो+मान् अपि न ईहते।१६-१७।

**९. अजगर -** हे समजून घेऊन अटळ प्रारब्ध कर्मानुसारच अर्थादिक सर्व प्राप्त होत असल्याने त्यासाठी व्यर्थ आयुष्य वायां दवडूं नये हा अजगरापासून शिकलेला धडा दोन श्लोकांत सांगितला आहे. इंद्रियांपासून होणारे सुख किंवा दुःख हे मनुष्य देहाप्रमाणेच पश्वादिक योनीत, नरकांत वा स्वर्गात कुठेही सारखेच असते. तेव्हां त्याचा सोस करण्यापेक्षां अजगराच्या वृत्तीने उदासीन राहावे. मग देहाचा निर्वाह कसा होईल असे म्हणाल तर आपल्या नशिबानुसार जो लहान, मोठा, कडू, गोड आहार कुणाची याचना न करता मिळेल तो घ्यावा. (*'ग्रासं सुमृष्टं विरसं, महान्तं स्तोकमेव वा। यदृच्छयैवाप्तं ग्रसेदाजगरोऽक्रियः।।'* भा.पु. ११:८:२.) तोही न मिळाला तर आहार दैवानेच मिळतो अशा निश्चयाने धीर धरून काकुळतीला न येतां उपाशीपोटी निजावे. *'जैसे न प्रार्थितां दुःख। प्राणी पावताती देख। तैसे न इच्छितां इन्द्रियसुख। भोगवी आवश्यक अदृष्ट।।'* ए.भा. ८:२१. बाह्यतः झोपूनही आपल्या हिताचा विचार जागा ठेवावा. ('स्वप्नजागृती मुकला। सुषुप्ती सांडोनि निजेला। शून्याचा पासोडा झाडिला। निजीं पहुडला निजत्वें।।' ए.भा. ८:४०.) आवश्यक ते बळ असूनही इंद्रियांच्या चिथावणीला दाद न देतां निष्क्रिय अजगराप्रमाणे पडून राहावे. मग हळूहळू इंद्रियांचे पाहणे, ऐकणे इत्यादि व्यापार थांबून जातात. (*'ओजः सहोबलयुतं बिभ्रद्देहमकर्मकम्। शयानो वीतनिद्रश्च नेहतेन्द्रियवानपि।।'* भा.पु. ११:८:४.)

**पूर्णो हीनोऽप्यजपरो न सर्पति न शुष्यति । ज्ञोऽब्धिवत्सिन्धुभिर्निम्नोऽनन्तपारो दुरत्ययः ।।१८।।**
**सदाऽक्षोभ्यो दुर्विगाह्यः प्रसन्नः स्तिमिताब्धिवत् ।**

ज्ञः अब्धिवत् सिन्धुभिः पूर्णः न सर्पति, हीनः न शुष्यति। स्तिमित+अब्धिवत् निम्नः अनन्तपारः दुः+अत्ययः अक्षोभ्यः (भवेत्)।१८।

**१०. समुद्र -** अशी उदासीनवृत्ती धारण केल्यावरही दैववशात् मिळणाऱ्या भोगांचा हर्ष किंवा न मिळाल्याचा खेद न मानता समचित्त राहण्याची समुद्राची शिकवण पुढच्या दीड श्लोकांत सांगतात. समुद्र जसा पावसाळ्यांत भरभरून वाहणाऱ्या नद्या येऊन मिळाल्या तरी फुगत नाही, आपली मर्यादा सोडत नाही किंवा ग्रीष्माने नद्यांचे प्रवाह आटले तरी कोरडा पडत नाही, तसाच ज्ञानी इष्टांच्या संयोगाने उचंबळत नाही (***न सर्पति***) किंवा त्यांच्या वियोगाने शोकाने सुकत नाही (***न शुष्यति***). सागरासारखाच तो गहन, गंभीर (***निम्नः***) असतो. समुद्राचा जसा पार लागत नाही तसाच योग्याच्या चित्ताचाही थांग लागत नाही. समुद्र जसा चौफेर विस्तीर्ण असतो तसाच योगी देशकालाच्या मर्यादांनी सीमित नसतो. सागराला ओलांडणे जसे दुरापास्त आहे (***दुरत्यय***) तसेच ज्ञानी पुरुषाची आज्ञा देवादिकांनाही अनुल्लंघनीय असते. समुद्र जसा आपली मारवेलीची मर्यादा ओलांडीत नाही तसाच ज्ञानी रागादि विकारांपासून मुक्त असल्याने अविकारी (***अक्षोभ्यः***) असतो. समुद्रात प्रवेश करणे कुणालाही सहज शक्य नसते तसेच योग्याशी कुणालाही सहज सलगी करता येत नाही. तरीही शांत सागरासारखाच तो बाह्यतः प्रसन्न असतो. (*'मुनिः प्रसन्नगम्भीरो दुर्विगाह्यो दुरत्ययः। अनन्तपारो ह्यक्षोभ्यः स्तिमितोद इवार्णकः।। समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः। नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः।।'* भा.पु. ११८५-६.)

**११. पतंग -** 'कुरङ्गमातङ्गपतङ्गभृङ्गमीना हताः पञ्चभिरेव पञ्च। एकः प्रमादी कथं न हन्यते यः सेवते पञ्चभिरेव पञ्च।।' (हरीण, हत्ती, पतंग, भुंगा आणि मासा हे अनुक्रमे नाद, स्पर्श, रूप, गंध आणि स्वाद ह्या एकेका

**नाऽवशोऽग्नौ विवन्नश्येत् स्त्रीलीलारूपमोहतः ।।१९।।**
**गृण्हीयात्सर्वतः सारं रमेन्नैकत्र चाल्पभुक् । संग्रहे नाशबीजेऽपि मधुकृद्वन्मुनिः सदा ।।२०।।**

स्त्री+लीला+रूप+मोहितः ना अग्नौ विवत् नश्येत्।१९। अपि मधुकृत्+वत् अल्प+भुक् मुनिः सदा सर्वतः सारं गृह्णीयात् न एकत्र। नाश+बीजे संग्रहे अपि (न) रमेत्।२०।

विषयाच्या आसक्तीने नाश पावतात तर या पांचही विषयांचा स्वैर उपभोग घेणारा कसा वांचेल?) या गरुडपुराणातील (प्रेतकल्पखंड-धर्मकांड ११:१८) वचनाकडे दुर्लक्ष करून विषयांतच रमणारा नाश पावतो हे ह्या पांचाकडून घतलेले शिक्षण पुढच्या साडेचार श्लोकांत सांगत आहेत. दिव्याच्या ज्योतीच्या रूपाला भुललेला पतंग जसा आपण होऊन दिव्यावर झेप घालून मृत्युमुखी पडतो तसाच स्त्रियांच्या रूपाला, तिच्या हावभाव-कटाक्षांना भुललेला असंयमी पुरुष नरकात पडतो.

**१२. मधुकृत् (मधुकर) -** या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे फुलामध्ये शिरून त्यांतला मध ग्रहण करतो तो भुंगा आणि दुसरी आपल्या आहारासाठी मध करणारी मधमाशी! भुंगा जसा लहान मोठा सर्व फुलांचा रस घेत एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जात असतो तद्वतच साधूने अनेक शास्त्रे आणि अनेक गुरूंपासून सार घेत जावे. (***'बहुशास्त्रगुरूपासनेऽपि सारादानं षट्पदवत्', सांख्यदर्शन ४:४***). स्वादाच्या आसक्तीने भुंगा एकाच फुलात राहिला तर संध्याकाळी ते फूल मिटले तर त्यांत अडकून पडतो. तसाच साधक एकाच घरी आसक्त होऊन राहिला तर त्यांच्या मोहात सांपडण्याची शक्यता आहे. म्हणून परिमित आहार ठेवून साधकाने एका ठिकाणी रमूं नये. मधमाशी कष्टाने संग्रह करून मधाचे पोळे करते ते तिच्याच नाशाला कारणीभूत होते ह्यावरून हा धडा घ्यावा की संग्रहांत आपल्याही नाशाचे बीज आहे म्हणून संग्रह करू नये. (*'अणुभ्यच महद्भ्यच शास्त्रेभ्यः कुशलो नरः। सर्वतः सारमादद्यात्पुष्पेभ्य इव षट्पदः।।'* भा.पु. ११:८:१०. 'सायंतनं श्वस्तनं वा न सङ्गृहीत भिक्षुकः। मक्षिका इव सङ्गृह्णन्, सह तेन विनश्यति।।' भा.पु. ११:८:१२.)

**बध्येत नाऽङ्गनास्पर्शाच्-छूरैर्हन्येत वेभवत् । अन्योऽकात्सञ्चितं लुब्धैर्न भुक्तं नार्पितं धनम् ।।२१।।**
**भुङ्क्तेऽकार्जितगृह्यन्नं प्राग्भिक्षुर्मधुहेव च ।**

अङ्गना+स्पर्शात् बध्येत, वा इभ+वत् शूरैः हन्येत। लुब्धैः अकात्+सञ्चितं न भुक्तं न अर्पितं धनं मधुहा इव अन्यः भुङ्क्ते। अक+अर्जित+गृहीत+अन्नं प्राक् भिक्षुः (भुङ्क्ते)।२१।

**१३. हत्ती -** मादीच्या वासाने मस्त हत्ती आपल्यासाठी खणलेल्या गर्तेत सांपडतो आणि जन्माचा दास होऊन जातो. किंवा दुसऱ्या बलिष्ठ हत्तीकडून मारला जातो. म्हणून शहाण्या माणसाने स्त्रीस्पर्शापासून दूर रहावे. (*'पदाऽपि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि। स्पृशन्करीव बध्येत करिण्या अङ्गसङ्गतः।।'* भा.पु. ११:८:१३.)

**१४. मधुहा -** त्याग किंवा भोग न करतां केलेला द्रव्यसंग्रह आपला घातच करतो आणि आपण प्रयत्न न करतांही आपल्याला अन्नादि भोग प्राप्त होऊ शकतात हे मधमाशी आणि मध गोळा करणारा मधुहर यांच्यापासून घेतलेले शहाणपण सांगतात. एकाने कष्टाने संपादन केलेले धन त्याने स्वतः भोगले नाही किंवा इतरांनाही दान केले नाही तर मधमाशीच्या पोळ्यांतल्या मधाप्रमाणे दुसराच लुबाडतो. तसेच गृहस्थाने उद्योग करून मिळवलेले अन्न त्याच्या आधीच संन्यासी खाऊन जातो. (*'न देयं नोपभोग्यं च लुब्धैर्यद्दुःखसञ्चितम्। भुङ्क्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधुः।।'* भा.पु. ११:८:१४.)

**१५. हरीण -** अर्ध्या श्लोकांत हरिणाची शिकवण सांगितली आहे. ग्राम्य गीताच्या श्रवणाने (भक्तिसंगीताच्या नव्हे) पुरुष घंटानादाने भुललेल्या हरिणासारखा बंधनांत अडकतो. नृत्यादिक पाहिल्यानेसुद्धा हरिणीच्या पोटी जन्मलेल्या ऋष्यशृङ्गमुनीप्रमाणे माणूस वेडा होतो. (*'ग्राम्यगीतं न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित्। शिक्षेद्धरिणाद्बद्धान्मृगयीर्गीतमोहितात्।। नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम्। आसां क्रीडनको वश्य, ऋष्यशृङ्गो मृगीसुतः।।'* भा.पु. ११:८:१७-१८.)

**ना बध्येतैणवद्गीतान्-नृत्याद्वाप्यृष्यश्रृङ्गवत्  ॥२२॥**
**प्रमाथिजिह्वया नैति बडिशैर्मत्स्यवल्लयम् । जय्याल्पभुज्या साऽसक्त्या जितं सर्वं जिते रसे ॥२३॥**

गीतात् नृत्यात् वा ना ऐणवत् वा ऋष्यशृङ्गवत् बध्येत।२२। ना प्रमाथि+जिह्वया बडिशैः मत्स्यवत् लयं एति। सा अल्प+भुज्या असक्त्या जय्या। रसे जिते सर्वं जितम्।२३।

**१६. मासा -** मत्स्यापासून मिळालेले ज्ञान सांगतात. मनाला अशांत करणारी जीभ माणसाचा, आमिषाच्या ओढीने गळींत अडकणाऱ्या माशासारखा घात करते. त्यासाठी मिताहाराने आणि अनासक्तीने जिभेवर ताबा मिळवावा. स्वादाची आवडनिवड टाकून अन्न औषधाप्रमाणे खावे. आधीचा (दुसऱ्या क्रमांकाचा) गुरू जो देहांतर्गत वायू (प्राण) त्याच्याकडून घेतलेलाच हा धडा वेगळ्या तऱ्हेने सांगितला आहे. सर्व इंद्रियांत जिह्वा ही जिंकण्याला कठीण असल्याने तिचा विषय जो रस तो जिंकला की सर्व (विषय) जिंकले असे म्हटले आहे. (*'इन्द्रियाणि जयन्त्याशु निराहारा मनीषिणः। वर्जयित्वा तु रसनं तन्निरन्नस्य वर्धते॥'* भा.पु. ११:८:२०. *'विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः। रसवर्ज्यं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते॥'* भ.गीता २:५९.)

**१७. वेश्या -** अगदी जिह्वाही जिंकणाऱ्या साधकाच्या परमार्थाला आशा अडवते. त्यासाठी वश्येकडून घेतलेले नैराश्याचे शिक्षण पुढच्या अडीच श्लोकांत दिले आहे. विदेहपुरीत राहणारी एक पिंगला नांवाची वेश्या होती. एका रात्री भरपूर पैसे देणाऱ्या गिऱ्हाइकाच्या आशेने (रस्त्यावरील येणाऱ्या-जाणाऱ्या पुरुषांना खुणावीत) दारांत उभी राहिली. रात्रभर वाट पाहूनही अपेक्षित असलेला पुरुष तिला मिळाला नाही. द्रव्याची तीव्र लालसा न पुरल्याने तिला जे वैफल्य आले त्यांतूनच दैवयोगाने तिला परिणामी सुख देणारा उबग (**निर्वेद**) आला आणि तिचा विवेक जागा झाला. स्वतःचा धिक्कार करीत ती म्हणू लागली, 'आपल्याच अंतरात राहणाऱ्या, आत्मानुभवाने निरतिशय आनंद आणि परम पुरुषार्थ देणाऱ्या, हृदयांतील (अहंकाराची) गांठ तोडून संशयाचे जाळे छेदून स्वस्वरूपात रमविणाऱ्या, रामाला सोडून मी ह्या

**वेश्यैकार्थदकान्ताशा-ध्वस्तनिद्रा सुखावहं । चिन्ताहेतुं हि निर्वेदं गत्वाऽत्मस्थं रतार्थदम् ।।२४।।**
**रामं हित्वा कुवृत्त्यान्यं भीशुङ्मोहदमध्रुवम् । काङ्क्षे धिङ्मात्मनात्मानं रमे क्रीत्वाऽमुनेति सा ।।२५।।**
**मत्वा तथाऽभूत्ध्याशाऽकं नैराश्यं परमं सुखम् ।**

एका वेश्या अर्थद+कान्त+आशा+ध्वस्त+निद्रा चिन्ता+हेतुं हि सुखावहं निर्वेदं गत्वा आत्मस्थं रत+अर्थदं।२४। रामं हित्वा कुवृत्त्या अन्यं भी+शुक्+मोहदं अध्रुवं काङ्क्षे। मां धिक्। आत्मना आत्मानं क्रीत्वा अमुना (अहं) रमे' इति सा।२५। मत्वा तथा अभूत्। आशा अकं, नैराश्यं परमं सुखम्।

हीन (वेश्या)वृत्तीने, ज्याच्या मनाविरुद्ध वागल्यास भय, विरहाने शोक आणि अतिस्नेहाने मोह वांट्याला येतात अशा नाशिवंत कामलंपट पुरुषाची इच्छा केली! माझा धिक्कार असो!! यापुढे मात्र मी हा देह स्वयंप्रकाश आत्मारामाला विकून (समर्पण करून) अपरोक्षतया (त्याच्याशी एकरूप होऊन) रममाण होईन.' असा विचार करून आणि आशेचा खोडा मोडून ती आत्मानंदांत निमग्न झाली. यावरून हे सप्ष्ट होते की आशाच सर्व दुःखाचे कारण आहे. नैराश्यांतच निरतिशय सुख आहे. *'निराशः सुखी पिङ्गलावत्'* असे सांख्यदर्शनात (अ.१४ सूत्र ९) म्हटले आहे. (*'आशा हि परमं दुःखं नैराश्यः परमं सुखम्। यथा संछिद्य कान्ताशा सुखं सुष्वाप पिङ्गला।।'* भा.पु. ११:८:४३.)

**१८. टिटवा -** आशारहित साधकानेही जर परिग्रह केला तर दुःखालाच कारण होतो ही टिटव्याची शिकवण एका श्लोकांत दिली आहे. आपल्या आवडत्या वस्तूंचा परिग्रह (संग्रह) दुःखपर्यवसायी आहे हे जाणणाऱ्याला अकिंचनालाही अपरिमित सुख मिळते. अकिंचन म्हणजे केवळ दरिद्री नव्हे तर ज्याने सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे असा. टिटवा मांसाचा घास (न खातां) तोंडांत धरून उडाला तर बाकीचे टिटवे त्याच्यावर हल्ला करून त्याला हैराण करून सोडतात. त्याने तो घास टाकून दिला तर मात्र सगळे टिटवे त्या घासाकडे झेपावतात आणि आमिष टाकून दिलेला (**व्यामिष**) टिटवा परिग्रहापासून मुक्त असल्याने दुरून सुखाने (सुखी) त्यांची मजा पाहात बसतो. (*'सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः। तदामिषं परित्यज्य स सुखं समविन्दत।।'* भा.पु. ११:९:२.)

**परिग्रहोऽकाय तज्ज्ञोऽस्वोऽप्यनन्तसुखायते ।।२६।।**
**सामिषं कुररं हन्ति शूरोऽतो व्यामिषः सुखी । मानावमानचिन्तोनः स्वक्रीडः स्वरतिः सुखी ।।२७।।**
**बालवद्धि जडोऽज्ञोऽर्भश्-चात्मानन्दो गुणातिगः । भङ्क्त्वैकैकं महारावान् रणन्तौ द्वौ कुमार्यपि ।।२८।।**
**पाण्योर्धृत्वैकैकशङ्खं रहःकृत्येऽलभत्सुखम् । कलिर्भूम्नि द्वयोर्वार्ता ह्येकतस्तच्छङ्खवच्चरेत् ।।२९।।**

परिग्रहः अकाय। तज्ज्ञः अस्वः अपि अनन्त+सुखायते। सामिषं कुररं शूरः हन्ति, व्यामिषः सुखी। मान+अवमान+चिन्ता+ऊनः स्व+क्रीडः स्व+रतिः जडः अज्ञः बालवत् सुखी। अर्भः गुण+अतिगः च आत्म+आनन्दौ। द्वौ रणन्तौ एक+एकं महा+रावान् (शङ्खान्) भङ्क्त्वा पाण्योः एक+एक शङ्खं धृत्वा कुमारी अपि रहः+कृत्ये सुखं अलभत्। भूम्नि कलिः द्वयोः वार्ता हि शङ्खवत् एकतः चरेत्।२८-२९।

**१९. बालक -** अशा परिग्रहशून्यालाही मानापमान आणि चिंता सोडतां आले तर तो परमसुखी होईल. ही बालकापासून घेतलेली शिकवण एका श्लोकात सांगतात. त्रिगुणात्मक प्रकृतीला ओलांडून परमात्मस्वरूप झालेला योगी, मान, अपमान आणि चिंता यांनी रहित असलेल्या स्वतःशीच खेळणाऱ्या आणि आपल्यातच हरवून गेलेल्या निष्क्रीय, अजाण बालकाप्रमाणे आत्मानंदात निमग्न असतो. आत्मसाक्षात्कारी पुरुष आणि बालक हे दोघेही चिन्तामुक्त असल्याने आपल्याच आनंदांत परमानंदात न्हात असतात. (*'द्वावैव चिन्तया मुक्तौ परमानन्द आप्लुतौ। यो विमुग्धो जडो बालो, यो गुणेभ्य परं गतः।।'* भा.पु. ११:९:४.)

**२०. कुमारी -** ह्या गुणातीत अवस्थेच्या प्राप्तीसाठी अभ्यासाची आवश्यकता आहे. हा अभ्यास अनेकांनी करून होत नाही आणि दोघांतही होत नाही हे कुमारीच्या कांकणाकडून घेतलेले कपिलमुनिप्रणीत सांख्यदर्शनातील (४:१०) शिक्षण सांगितले आहे. कुणी एक कुमारी घरांतील सर्व कुटुंबीय बाहेर गेलेले असतां आलेल्या सोयऱ्यांच्या पाहुणचारासाठी एकांतात साळी कांडायला बसली. त्या वेळी तिच्या हातातील शंखांच्या कांकणांचा मोठा आवाज होऊ लागला.

**एकचार्यप्रमत्तोऽल्प-वाग्गुहास्थोऽगृहो मुनिः । एकोऽहिवद्गत्यलक्ष्यो गृहारम्भोऽध्रुवात्मनः ॥३०॥**
**विफलोऽकाय सर्पोऽन्य-कृतधाम्न्येधते सुखम् ।**

अहिवत् मुनिः एक+चारी अप्रमत्तः अल्प+वाक् अगृहः गति+अलक्ष्यः। अध्रुव+आत्मनः गृह+आरम्भः।३०। विफलः अकाय। सर्पः अन्य+कृत् धाम्नि सुखं एधते।

त्या आवाजाने आपली गरीबी पाहुण्याना कळेल ह्या लाजेने तिने सगळी कांकणे काढली आणि प्रत्येक हातात फक्त दोन-दोन ठेवली. पण त्याचाही आवाज होतो असे पाहून तिने आणखी कांकणे काढून हातात सौभाग्यचिह्न म्हणून एकेकच कांकण ठेवले (***'पाण्योः एकैक शंखं धृत्वा'***). अशा रीतीने तिचे साळी कांडण्याचे काम गुप्तपणे करून (***'रहःकृत्ये'***) ती सुखी झाली (***'सुखं अलभत्।'***). या कलियुगात भूलोकी अनेकजण किंवा दोघेसुद्धा एकत्र आले की खाण्यापिण्याच्या (विषयाच्या, प्रपंचाच्या) गोष्टी होणारच. त्यामुळे शंखा(च्या कांकणां)प्रमाणे एकट्यानेच तप करावे. (*'वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि। एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कङ्कणः॥'* भा.पु. ११:९:१०.)

**२१. सर्प -** वरीलप्रमाणे निःसंग झाल्यावरही परमार्थांत विघ्न होऊं नये यासाठी ठराविक घर करू नये हे सर्पाकडून घेतलेले शिक्षण दीड श्लोकात सांगितले आहे. मुनीने सापासारखे एकट्याने संचार करीत (***'एकचारी'***), सावधानपणे (***'अप्रमत्त'***), बोलणे मोजके ठेवून (***'अल्पवाक्'***), बाहेरील वर्तनावरून आपली आंतरिक स्थिती प्रकट न होऊ देता (***'गतिअलक्ष्यो'***), वास्तव्यासाठी घर न बांधता (***'अगृहो'***) गुहेत किंवा घळीत राहावे (***'गुहास्थः'***). नाशिवंत देहासाठी (***'अध्रुवस्य आत्मनः'***) घर बांधण्याचा खटाटोप (***'गृहारम्भः'***) व्यर्थ (***'विफलः'***) आणि कष्टदायक (***'अकाय'***) आहे हे जाणून, *'अनारम्भेऽपि परगृहे सुखी सर्पवत्'* कपिलमुनींच्या वचनाला (सांख्यदर्शन ४:१०) अनुसरून साप जसा दुसऱ्याने बांधलेल्या घरांत सुखाने राहतो तसे राहावे. (*'एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः। अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः॥ गृहारम्भोऽतिदुःखाय विफलश्चाध्रुवात्मनः। सर्पः परकृतं वेश्म प्रविश्य सुखमेधते॥'* भा.पु.११:९:१४-१५.)

**जितश्वासासनेनेशे वैराग्याभ्यासबद्धहृत् ।।३१।।**
**संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्ववृद्ध्यैत्यनिन्धनम् । निर्वाणं वेत्त्यतो नान्तर्-बहिःस्थं मुनिरात्मदृक् ।।३२।।**
**यथेष्वितात्मेषुकृन्नो वेदेनं यान्तमग्रतः ।**

जित+श्वास+आसनेन वैराग्य+अभ्यास+बद्ध+हृत् ईशे।३१। संयुक्तं वासनां मुक्त्वा सत्त्व+वृद्ध्या अनिन्धनं निर्वाणं एति। अतः आत्म+दृक् मुनिः अन्तः बहिस्थं न वेत्ति।३२। यथा इषु+आत्मा इषु+कृत् अग्रतः यान्तं इनं न वेद।

**२२. शरकार -** एकांतात वास करणाराही जर आसन आणि श्वास यांना जिंकेल तरच त्याला अविचल एकाग्रतेचा लाभ होईल हे शरकाराकडून घेतलेले शिक्षण आतां दोन श्लोकात सांगतात. वैराग्यपूर्वक अभ्यास करून आसनजय आणि प्राणजय साधणाऱ्या योग्याने द्वैताचे भानही जिच्यात राहत नाही अशा समाधीच्या सिद्धीसाठी दोषदृष्टीचा त्याग आणि विषयांचा भोग न मिळाला तरी तळमळ न होणे यांच्या सरावाने दृढ झालेल्या ऐहिक आणि पारलौकिक विषयांसंबंधीच्या वैराग्याने विक्षेपांचा निरास करून, चित्ताला स्थिर करण्याच्या अभ्यासाने चित्तावर ताबा मिळवून ते बाणाप्रमाणे प्रणवरूपी धनुष्यावर चढवून त्याचे प्रत्यक्ब्रह्माशी एकरूप अशा परब्रह्माच्या लक्ष्यावर उत्तम प्रकारे संधान करावे. भावार्थ असा. *'यत्रैकाग्रता तत्राविशेषात्'* या ब्रह्मसूत्रानुसार (४:४:११) (चित्ताची) एकाग्रता हे ध्यानाचे प्रमुख साधन होय. ती एकाग्रता *'आसीनः संभवात्'* या सूत्रानुसार (४:१:७) आसनानेच साधत असल्याने प्रथम आसनजय केला पाहिजे. आसन पक्के झाले की मग श्वासावर नियंत्रण करतां येते. श्वास(प्राण)जय झाला की श्वासाच्या अधीन असलेले मनही निश्चल होते. त्याला वैराग्याने विक्षेपरहित करून आणि अभ्यासाने बांधून म्हणजेच वश करून (**अभ्यासेन बद्धं**) ध्येयावर (परमेश्वरावर) स्थिर करावे (**ईशे संयुक्तं**). त्या मनाचा झोपेत जसा लय होतो तसा मुळीच होत नाही. लय आणि विक्षेप हे मनाचे गुणधर्म असले तरी परमानंदस्वरूप ईश्वराशी संलग्न झाल्याने लय-विक्षेपांना कारणीभूत तमोगुण आणि रजोगुण यांचे दमन होते आणि सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो.

**प्रेम्णाप्यचलहृद्ध्यानाद्-विष्णोः सारूप्यमेति ना ।।३३।।**
**प्राग्रूपमुत्सृजन्पेशस्कृद्ध्यानात्कीटवद्द्रुतम् ।**

विष्णोः प्रेम्णा अचल+हृत्+ध्यानात् ना प्राक्+रूपं उत्सृजन् पेशस्कृत्+ध्यानात् कीटवत् द्रुतं सारूप्यं एति।३३।

शेवटी सत्त्वगुणाचाही उपशम होऊन ते मन तिन्ही गुण आणि त्यांची कार्ये यांच्यापासून मुक्त होते (**कर्मवासनां मुक्त्वा**). असे वृत्तिशून्य (**निर्वाणं**) मन ध्येयाकार (ब्रह्माकार) होऊन आपल्या स्वरूपात स्थिर होते. आा रीतीने पतंजलींच्या *'योगश्चित्तवृत्तिनिरोधः'* (यो.सू. १:४) 'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्' या सूत्रांनसार योग सिद्ध होतो. वृत्तिशून्य मनाच्या ध्येयाकार अवस्थेलाच योगाच्या भाष्यकारांनी असंप्रज्ञात समाधी असे नाव दिले आहे. (*'मनसो वृत्तिशून्यस्य ब्रह्माकारतया स्थितिः। याऽसम्प्रज्ञातनामाऽसौ समाधिरभिधीयते।।'*) द्वैताचे भानच नसल्याने आंत-बाहेर त्या योग्याला कांहीच दिसत नाही कारण तो स्वरूपाच्या दर्शनात निमग्न असतो (*'आत्मदृक्'*). आतां दृष्टान्त सांगितला आहे. *'इषुकारवन्नैकचित्तस्य समाधिहानिः'* या सांख्यसूत्रानुसार (४:१४) बाणाला धार लावण्यात गढून गेलेल्या शरकाराला ('इषुकार') समोर रस्त्यावरून वाजतगाजत गेलेला राजाही (**इन**) कळला नाही. अशा उपासकाला (प्रारब्धाच्या प्रतिबंधाने) आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वीच मृत्यू आला तर त्याच्या अभ्यासाच्या प्रभावाने आणि ईश्वराच्या अनुग्रहाने मृत्यूच्या वेळी सुषुम्ना नाडीचा मार्ग मिळून तो मुक्त होतो अशा अर्थाचे ब्रह्मसूत्र आहे (४:२:१७). *('मन एकत्र संयुज्याज्जितश्वासो जितासनः। वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतन्द्रितः।। यस्मिन्मनो लब्धपदं यदैतच्छनैः शनैर्मुञ्चति कमरिणून्। सत्त्वेन वृद्धेन रजस्तमच विधूय निर्वाणमुपैत्यनिन्धनम्।। तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किञ्चिद्बहिरन्तरो वा। यथेषुकारो नृपतिं व्रजन्तमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे।।'* भा.पु. ११:९:११-१३.)

**यथोर्णनाभिस्ततोर्णां विहार्यान्तेऽत्ति तां तथा ।।३४।।**
**प्राक्स्वमायासृष्टमेकः संहृत्याभूत् क्षयेऽद्वयः । शक्त्याखिलाश्रयः सर्वेट् कालेनात्मानुभावतः ।।३५।।**

यथा ऊर्णनाभिः ऊर्णां तत विहार्य तां अत्ति तथा..।३४। एकः प्राक् स्व+माया+सृष्टं (जगत्) संहृत्य क्षये अद्वयः अभूत्। शक्त्या अखिल+आश्रयः सर्वेट् आत्म+अनुभावतः..।३५।

**२३. कुंभारीण माशी (पेशस्कार) -** वरीलप्रमाणे ध्याननिष्ठ असलेल्या साधकाला जीवात्म्याशी एकरूपच अशा परमात्म्याचे स्वरूप प्राप्त होणे हे नवल नाही, हे कीटकापासून मिळवलेले ज्ञान आतां सांगत आहेत. प्रेमाने, द्वेषाने किंवा भयानेसुद्धा (**प्रेम्णा अपि**) व्यापक परमात्म्याचे (**विष्णोः**) स्थिर चित्ताने ध्यान केले म्हणजेच, विजातीय प्रत्ययांचा निरास करीत आणि सजातीय प्रत्ययांना प्रवाहित करून निदिध्यासन केल्याने, मिथ्या उपाधींशी तादात्म्य पावून अध्यासाने स्वीकारलेले कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादींनी युक्त असे मायिक रूप (जीवत्व) टाकून देऊन पुरुष (**ना**) शीघ्रच परमात्म्याशी एकरूप होतो. ('प्रारब्धजनित') प्रतिबंध नसले तर याच जन्मात अन्यथा जन्मातराने तो मुक्त होतो. हेच व्यासमुनींनी *'ऐहिकमप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात्'* सांगितले आहे. प्रतिबंधांच्या अभावी ज्या जन्मी उपदेश व अभ्यास त्याच जन्मी ज्ञान होऊन मोक्ष होतो हे ठीक आहे. पण तसा तो झाला नाही तर जन्मांतरी होतो याला प्रमाण म्हणून ऐतरेय उपनिषदातील (२:५) वामदेवाने गर्भात पहुडलेल्या अवस्थेतच आपले ज्ञान प्रकट केल्याचे उदाहरण दिले आहे. कुंभारीण माशीने आपल्या घरट्यात आणून ठेवलेला किडा जसा तिच्याकडून वरचेवर दंश झाल्याने तिच्या भयाने तिचे निरंतर ध्यान करून तिच्यासारखाच (कुंभारीण माशीच) होतो. जीव तर स्वरूपतः ब्रह्मच असल्याने (*'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'*, बृ.उ. ४:४:५१) त्याचे ब्रह्मरूप पावणे हे नवल नाही. ('यत्र यत्र मनो देही धारयेत् सकलं धिया। स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वाऽपि याति तत्तत्स्वरूपताम्।। कीटः पेशस्कृतं ध्यायन् कुडां तेन प्रवेशितः। याति तत्साम्यतां राजन् पूर्वरूपमसन्त्यजन्।।' भा.पु. ११:९:२२-२३.)

**साम्येतसत्त्वादिशक्तिः प्रधानपुरुषेडजः । व्युपाधिः परमानन्दो मोक्षाख्यः सपरावरः ।।३६।।**
**गुणत्मिकां स्वमायां स क्षोभयन्स्वानुभावतः । तया सृजति सूत्रं सा त्रिगुणा शक्तिरासृजत् ।।३७।।**
**विश्वं यस्मिन्प्रोतमेतद् येन संसरते पुमान् ।**

साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः वि+उपाधिः प्रधान+पुरुष+ईट् अजः मोक्ष+आख्यः स+पर+अवरः परम+आनन्दः (आस्ते)।३६। सः स्व+अनुभावतः गुण+आत्मिकां स्व+मायां क्षोभयन् तया सूत्रं सृजति। सा त्रिगुणा शक्तिः विश्वं असृजत्।३७। यस्मिन् पुमान् संसरते येन तत् विश्वं प्रोतम्।

**२४. कांतीण -** ईश्वराच्या एकमेवाद्वितीयत्वाचे कांतिणीकडून घेतलेले ज्ञान आतां सांगितले आहे. कुठल्याही बाह्य सामग्रीविना कोळीण (**ऊर्णनाभी**) जशी आपल्याच नाभीपासून निघालेल्या तंतूला मुखाद्वारे काढून तो पसरून त्या जाळ्यात क्रीडा करते आणि ती क्रीडा झाल्यावर ते जाळे खाऊन टाकते. त्याचप्रमाणे सृष्टीच्या पूर्वी (**'प्राक्'**) स्वयंभू एकमेवाद्वितीय (**'एकः'**) परमेश्वराने आपल्या ईक्षणाने (दृष्टिक्षेपाने) उपादानकारण जी माया तिच्या द्वारां जगाची उत्पत्ती केली. जगताच्या लयाच्या वेळी (**क्षये**) आपल्याच काळशक्तीने त्याचा आपल्यांतच उपसंहार करून पुनश्च तो एकमेवाद्वितीय झाला. कालांतराने आपल्या आत्मशक्तीने (**आत्मानुभावतः**) सत्त्वादि त्रिगुणांची साम्यदशा झाल्यावर (**साम्य+इत+सत्त्व+आदि+शक्तिः**), प्रकृती आणि पुरुष यांचा स्वामी आणि म्हणूनच अजन्मा (**प्रधान+पुरुष+ईट् अजः**) असलेला निरुपाधिक (**व्युपाधिः**) परमानंदस्वरूप (**परमानंदः**) मोक्ष (**मोक्षाख्यः**) तोच आहे. हा कोण आहे? ब्रह्मा? नव्हे तर ब्रह्मादि श्रेष्ठ आणि इतर सर्व जीवात्मे यांचा स्वतांत उपसंहार करणाराच (**सपरावरः**) मोक्षरूपी परमात्मा आहे. तोच परमात्मा आपल्या आत्मशक्तीने (**स्वानुभावतः**) आपल्या त्रिगुणात्मक मायेला क्षोभवून तिच्या द्वारा जीवाच्या संसरणाचे कारण जे क्रियाशक्तिप्रधान महत्तत्त्व (**सूत्र**) निर्माण केले. त्याच त्रिगुणात्मक शक्तीने त्या सूत्रापासून अहंकाराद्वारा सर्व विश्वाची निर्मिती केली. त्याच कारणभूत समष्टीरूप सूत्राने हे जग गुंफले आहे.

**देहात्स्तो बोधवैराग्ये पारक्यात्सोद्भवक्षयात् ।।३८।।**
**आत्मेष्टभृत्सृष्टबीजः प्रियेच्छुर्नश्यति द्रुवत् । गावः स्वार्थे सपत्नीवत्तं लुनन्ति हि दुर्लभम् ।।३९।।**
**मत्वा नृजन्मात्तवित्क्ष्मां चरे मुक्तोऽनहंकृतिः ।**

पारक्यात् स+उद्भव+क्षयात् बोधवैराग्ये स्तः।३८। प्रिय+इच्छुः आत्म+इष्ट+भृत् सृष्ट+बीजः द्रुवत् नश्यति। इन्द्रियाणि तं सपत्नीवत् लुनन्ति।३९। नृजन्म दुर्लभं हि मत्वा आत्त+वित् क्ष्मां अन्+अहंकृतिः चरे।

याज्ञवल्क्याने गौतमाला सांगितल्याप्रमाणे हा लोक, परलोक, सर्व जीवमात्र ज्या सूत्रांत बांधलेले आहेत ते सूत्र म्हणजे वायूच होय (बृ.उ. ३:७:२). याच प्राणात्मक सूत्राने जीव या संसारांत फिरत असतो. (*'केवलात्मानुभावेन स्वमायां त्रिगुणात्मिकाम्। संक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिन्दम।। तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजन्तीं विश्वतोमुखम्। यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान्।। यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां संतत्य वक्त्रतः। तथा विहृत्य भूयस्तां ग्रसत्येवं महेश्वरः।।'* भा.पु. ११:९:२२-२३.)

**देह**सुद्धां गुरूच आहे हे सांगतात. देह कोल्ह्याकुत्र्यांसारख्या परक्यांचे भक्ष्य (**पारक्यात्**) होत असल्याने त्याच्यापासून विवेकाचे (**बोध**) शिक्षण मिळते. मातेचे रक्त ('रज') आणि पित्याचे रेत या दोन मलांपासून देहाची उत्पत्ती (**उद्भव**) होते आणि मृत्यू (**क्षय**) तर जन्माच्या आधीपासूनच त्याच्या मागे लागलेला आहे. असा घृणास्पद देह सतत धारण करणे ह्यापेक्षा वैराग्याला अधिक मोठे कारण काय असूं शकते? विष्णुपुराणात म्हटले आहे की आपल्या देहाच्या दुर्गंधीला जो माणूस विटत नाही त्याला वैराग्य व्हायला दुसरा काय उपदेश करावा? स्वतःचे आणि स्वकीयांचे पोषण करणारा (**आत्म+इष्ट+भृत्**) सदैव सुखाची अभिलाषा बाळगणारा (**प्रियेच्छुः**) हा देह, दुसऱ्या वृक्षाचे बीज निर्माण करून सुकणाऱ्या वृक्षाप्रमाणे जन्मांतराचे बीजरूप कर्म निर्माण करून नाश पावतो. इंद्रिये ह्या देहरूपी पतीला, सवतीसारख्या आपापल्या विषयांकडे खेचत असतात.

**तच्छ्रुत्वा समचित्तोऽभून् मुक्तसङ्गो यदुर्द्रुतम् ।।४०।।**

तत् श्रुत्वा यदुः द्रुतं सम+चिच्चः मुक्त+सङ्गः अभूत्।४०।

असे असले तरी आत्मज्ञानाचा अधिकार या देहाला असल्याने तो दुर्लभ मानून वरील चोवीस गुरूंकडून घेतलेल्या ज्ञानाने सर्व संगांचा त्याग करून निरहंकार वृत्तीने या भूमीवर अवशिष्ट प्रारब्ध भोगीत मी ह्या पृथ्वीवर संचार करतो. (*'देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्त्वनिधनं सततार्त्युदर्कम्। तत्त्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसङ्गः।।* भा.पु. ११:९:२५.)

हा यदुराजाला सर्व संग आणि त्याचे मूळ अहंकार यांना सोडून निर्विकारपणे प्रारब्ध भोगीत संचार करण्याचा अप्रत्यक्ष आदेशच होता. सद्गुरुकृपेने ज्ञान झाल्यानंतर संचित कर्माचा नाश होतो. प्रारब्ध मात्र भोगूनच संपवावे लागते, ह्या छांदोग्योपनिषदातील (६:१४:२) आणि ब्रह्मसूत्रातील (४:१:१९) सिद्धांताला हे धरूनच आहे. हा त्या अवधूताचा आदेश श्रवण करून यदुराजा, अधिकारी उपदेशकाच्या प्रभावाने, ज्याचे चित्त सम म्हणजे सर्वसंगपरित्याग केल्याने शत्रू, मित्र, उदासीन, आप, पर हे सर्व ज्याला सारखेच आहेत, तसा झाला; किंवा ज्याचे चित्त सम म्हणजे विकारशून्य आहे असा झाला. याज्ञवल्क्यस्मृतीत (प्रायश्चित्ताध्याय, ५४) म्हटल्याप्रमाणे कांट्यांनी ओरबाडणाऱ्यावर किंवा चंदनाने माखणाऱ्यावर जो सारखाच शांत ('अक्रुद्ध') आणि प्रसन्न ('परितुष्ट') असतो असा यदु झाला. हा सद्गुकृपेचा प्रभाव होय.

अधिकारी सद्गुरूंकडून श्रवण केल्याने हे ज्ञान यदूला लगेच झाले. कठोपनिषदांत प्रतिपादल्याप्रमाणे (१:२:७-८) या ब्रह्मज्ञानाचा निपुण वक्ता ही नवलाईचीच गोष्ट आहे; तसेच ह्या ज्ञानाची प्राप्तीही कुणा विरळ्या भाग्यवंतालाचा होते. अनधिकारी वक्त्याकडून हे समजणे शक्य नाही. स्वरूपसाक्षात्कार झालेल्या गुरूविना ह्या अचिंत्य आणि सूक्ष्मतम

ज्ञानात गती होत नाही. (*'अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः। सर्वसङ्गविनिर्मुक्तः समचित्तो बभूव ह।।'* भा.पु. ११:९:३३.)

असे **हे परमार्थाचा उपदेश करणारे गुरू नाहीत तर आपल्या बुद्धीने केलेले असंभावनादि दोषांचे निराकरण करणारे गुरू आहेत** हे लक्षात घ्यायला हवे. बृहदारण्यक उपनिषदांत (३:९:२७) याज्ञवल्क्याने ह्याच औपनिषद पुरुषाविषयी शाकल्याला विचारले होते आणि त्याला उत्तर देतां न आल्याने त्याचे मस्तक गळून पडले होते. वरील ३८ श्लोकांना श्रीस्वामिमहाराजांनी अवधूतगीता (दत्तपुराण ४५:८ च्या टीकेत) असे नांव देऊन ते श्लोक तिथे तसेच दिले आहेत.

## प्रह्लादास उपदेश

आतां चार श्लोकांत (दत्तप्रभूंनी) प्रह्लादावर केलेल्या अनुग्रहाचे संक्षेपाने वर्णन केले आहे. हाच विषय श्रीमहाराजांनी श्रीमद्दत्तपुराणाच्या १५ व १६ व्या अध्यायात विस्ताराने मांडला आहे. त्या अध्यायांतील संबंधित श्लोक एकत्र करून ते स्तोत्रसंग्रहात 'श्रीदत्तात्रेयहृदयम्' या नांवाने प्रसिद्ध झाले आहे. अवधूतगीतेप्रमाणेच याही आख्यानाचे मूळ श्रीमद्भागवत पुराणात आहे. विषयाची मांडणी, शब्दयोजना इत्यादीही भागवतातील मूळ आख्यानाला अनुसरूनच आहेत. कांही कांही श्लोक तर जवळ जवळ सारखेच आहेत. ह्या दोन्ही स्रोतांचा उपयोग करीतच आपण ह्या चार श्लोकांची टीका पाहणे उद्बोधक ठरेल.

भागवतपुराणात सप्तम स्कंधांत नारद-युधिष्ठिर संवादात हे आख्यान नारदांनी सांगितले आहे. बालपणापासून भागवत धर्मात रमलेला असूनही प्रह्लादाला आत्मज्ञानाच्या अभावाने परम शांतीची प्राप्ती झाली नाही. त्यामुळे उदासीन वृत्तीने शिकारीच्या निमित्ताने तो आपल्या लवाजम्यासह रानावनात संचार करीत असतां कावेरीच्या तीरी सह्याद्री पर्वतावर त्याला सद्भाग्याने, धुळीच्या लेपाने ज्याचे मलापहारक तेज झांकलेले आहे,

**कष्टसंसारादिहेतु-प्राणार्थेहापनुत्तये । वैराग्यतोषदमधुकृन् महाहिसुशिक्षितम् ।।४१।।**

कष्ट+संसार+आदि+हेतु+प्राण+अर्थ+इहा अपनुत्तये वैराग्य+तोष+दं मधुकृत्+महा+अहि+सुशिक्षितम्..।४१।

असा एक अवधूत भूमीवर पहुडलेला दिसला. भागवतात अवधूत शब्दाचा उपयोग न करता त्याचा आजगर मुनि असा निर्देश केला आहे. त्याच्या बोलण्याचालण्यावरून किंवा इतर बाह्य चिह्नांवरून लोकांना त्याच्या वर्णाचा वा आश्रमाचा कांहीच पत्ता लागत नव्हता. त्याच्या पायांवर मस्तक ठेवून प्रह्लादाने त्याला नमस्कार केला, त्याची विधिवत् पूजा केली आणि तो महाभागवत दैत्य त्याला नम्रपणे प्रश्न करू लागला. 'महाराज! आपण कांही उद्योग करतांना दिसत नाहीत आणि निर्धन आहांत तरी एखाद्या भोगवान पुरुषाप्रमाणे आपला देह पुष्ट दिसतो. खरे तर उद्योगाने धन संपादन केल्यावर आहार-विहारादि इष्ट भोग प्राप्त झाल्यानेच माणसाचा देह असा पुष्ट होतो. आपण तर ज्ञानी, निपुण, वाक्पटु आणि कार्यक्षम असूनही इथे कांहीच न करता झोपलेले दिसता! तरीही आपले शरीर पुष्ट कसे आहे? आपल्याला प्राण किंवा धन यांची कांहीच चिंता दिसत नाही. या निर्मनुष्य ठिकाणी आपल्याला कशाचेच भयही वाटत नाही. आपले हे चरित्र खरोखर अतर्क्य आहे! कृपया, आपण आपल्याला योग्य वाटल्यास, मला पडलेल्या या प्रश्नाचे उत्तर द्यावे.' प्रह्लादाने नम्रपणे आणि साक्षेपाने, जिज्ञासापूर्वक विचारलेल्या या प्रश्नाने संतुष्ट झालेल्या परमकारुणिक अत्रिपुत्र दत्तप्रभूंनी, 'सगुण साक्षात्कार होऊनही हा अजून अज्ञानीच आहे' हे जणू जाणूनच कृपापूर्ण स्मित करीत बोलण्यास आरंभ केला. 'दैत्यकुलात जन्मूनही आपल्या भक्तीने नरसिंहाला अवतार घ्यायला लावणारा नारदमुनींचा शिष्य तूच आहेस ना? तुझ्या हृदयांत भगवान नारायणांचा निरंतर निवास आहे आणि तू शुद्ध अव्यभिचारी भक्तीने, सूर्याने अंधार पळवावा तसे, अज्ञान नष्ट करतोस. तूं अंतःकरणाच्या शुद्धीच्या इच्छेने हे प्रश्न विचारीत असल्याने मी तुला सांगतो. ऐक!'

'मी अज्ञानवश दुष्पूर वासनासरितांच्या लाटांत वाहात कर्मगतीने अनेक योनीत फिरत फिरत अखेर स्वर्ग, मोक्ष आणि नरक यांचे द्वार असलेल्या ह्या मनुष्य जन्माला आलो. इथे मी पाहिले की सुखासाठी सर्वच धडपडतात पण त्यांच्या वाटाला दुःखच येते.

**प्रऱ्हादायाप्यात्मतत्त्वं प्राहेदं भगवान् परम् । स्वरूपं सुखमीहोप-रतिस्तनुरशाश्वतान् ।।४२।।**
**दृष्ट्वा भोगान्संविशन्सन् स्वपेन्नेतः परं हितम् ।**

इदं आत्म+तत्त्वं भगवान् प्रऱ्हादाय अपि प्राह। स्वरूपं सुखं इहा+उपरतिः तनुः।४२। भोगान् अशाश्वतान् दृष्ट्वा संविशन् सन् स्वपेत्। इतः परं हितं न।

त्यामुळे **दुःखासारखेच सुखही अनायासच मिळते** असा विचार करून मी सुखासाठी प्रयत्न करण्याचे सोडून दिले. खरे तर स्वरूपतः आपण (आत्मा) सुखरूपच असतो. प्राण आणि धन यांची लालसाच या कष्टमय संसाराचे मूळ कारण आहे. ती घालवण्यासाठी मधमाशी आणि अजगर यांच्याकडून वैराग्य तसेच संतोष देणारे शिक्षण मी घेतले आहे.'

त्याच परमात्म्याच्या ज्ञानाचा उपदेश भगवान दत्तात्रेयांनी प्रह्लादाला केला. 'आपण खरे तर सुखरूपच आहोत. अज्ञानाने अनुभवाला येणारे हे जे दुःख आहे ते आपले वास्तविक स्वरूप नाही. विचार करून पाहिल्यास जिथे जिथे आपण (आत्मा) तिथे तिथे दुःख आहेच असे नाही. म्हणजेच दुःख आगंतुक आहे. ते आत्म्याचे स्वरूप होऊच शकत नाही. झोपेत असतांना किंवा समाधीत असतांना आत्मा साक्षित्वाने विद्यमान असूनही दुःखाचा पत्ताही नसतो. यावरून दुःख हे तापवलेल्या पाण्याच्या उष्णतेप्रमाणे तात्कालिक असते. स्वभावतः पाणी जसे थंड असते तसाच आत्माही सुखरूप आहे. हे अनुभवाला येत नाही त्याचे कारण त्याला अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश ह्या पांच क्लेशांचा अडसर असतो. हे क्लेश नष्ट झाले की आपला स्वाभाविक आनंद आपोआपच प्रकटतो. ह्यांच्यामुळेच आपण निरनिराळ्या वासनांच्या फेऱ्यांत सांपडतो. त्या वासनांचा उपशम झाला की आपले आंतरिक आत्मसुख आपोआपच प्रकटते. पाण्यासाठी व्याकुळलेल्या अभाग्याने शेवाळाने झांकलेले पाणी सोडून मृगजळाच्या मागे धावावे तसे हे लोक आपल्याच अंतरांतला आनंदाचा झरा सोडून सुखप्राप्तीसाठी वायांच धडपडत असतात. क्वचित् काकतालीय न्यायाने

ह्या धडपडीला यश आल्यासारखे वाटले तरी ते वैषयिक सुख मृगजळाप्रमाणे क्षणभंगुर असते. काम आणि अर्थ ह्यांच्या अभिलाषेनेच शोक, मोह, राग, द्वेष आणि श्रम होतात. अशा रीतीने चित्त विचलित झालेल्या पुरुषाला भय आणि चिंता यांच्या योगाने धड झोपही येत नाही. असे **हे ऐहिक भोग, आदि आणि अंत असलेले, क्षणभंगुर, अशाश्वत आहेत तसेच ते परतंत्रही आहेत** हे जाणून मी दैवाने प्राप्त होणाऱ्या भोगांचे सेवन निरिच्छपणे करूनही त्यांच्यासाठी कसलेही प्रयत्न न करतां स्वस्थ पडून राहतो. यदृच्छेने कांहीच न मिळाले तरी दैवानेच सर्व गोष्टी मिळतात असा निश्चय करून धीराने अजगरासारखा झोपून राहतो. यापेक्षां श्रेष्ठ असे दुसरे कल्याणकारक साधन नाही. मधमाशी आणि अजगर यांचे शिष्यत्व स्वीकारून मी प्राणाची तसेच वित्ताची इच्छा टाकून दिली आहे. द्रव्याचा लोभ सोडल्याने मला आता दंड, कर, राजस्व यांच्याद्वारा धन नेणाऱ्या राजाची, चोरांची वा याचकांची भीती उरली नाही. जीवाची आशा सोडल्याने मी हिंस्र प्राणी, शत्रू किंवा काळ यांनाही मुळीच घाबरत नाही. भ्रमर (मधमाशी) जसा निरनिराळ्या पुष्पांतून मिळेल तो रस ग्रहण करतो त्याप्रमाणे मी जास्ती-कमी, रुचकर-रुचीहीन, मानाने वा तिरस्काराने, ताजे-शिळे, रात्री किंवा दिवसा जे अन्न मिळेल त्यांत समाधान मानतो. मधमाशीप्रमाणे संग्रह केल्यास मालकाला मारून ते धन दुसरेच घेऊन जातात हे जाणून मी संग्रह करीत नाही. दैवाने मिळेल ते वस्त्र, वल्कल असो की रेशीम, अंगावर घेतो. कधी भस्मावर, कधी दगडावर तर कधी तरटावर, गावांत वा रानात, मी झोपतो. कधी असा धुळीने माखलेला असतो तर कधी कधी छान आंघोळ करून वस्त्रे आणि अलंकार घातलेला असतो. कधी कधी वस्त्रांशिवायच राहतो. कधी पायी, कधी गाडीत, कधी हत्तीवर तर कधी घोड्यावर बसून फिरतो. कधी मौनी असतो तर कधी वेड्यासारखा वागतो. व्यक्ती तितक्या प्रकृती असतात हे ध्यानात घेऊन मी ना कुणाची निंदा करतो ना स्तुती! (*'नाहं निंदे न च स्तौमि स्वभावविषमं जनम्।'*) परमेश्वराजवळ सर्वांचेच भले चिंतितो. ब्रह्माचीच ओढ, ब्रह्मावरच निष्ठा असलेला मी ब्रह्मरूप आहे आणि सर्वांना ब्रह्मबुद्धीनेच पाहतो. सुसंस्कृत ब्राह्मण, अंत्यज, गाय किंवा श्वान हे मला सारखेच आहेत.' (*'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।।'* भ.गीता ५:१७.)

**हुनेद्विकल्पं चित्तौ तां मनस्यर्थभ्रमे तु तत् ।।४३।।**
**वैकारिके तं मायायां तां स्वस्मिन्विरमेत्ततः । इत्युक्त्वा विरराामाजः प्रन्हादोऽप्यभवत्तथा ।।४४।।**

विकल्पं चि;त्तौ हनेत् । तां अर्थ +भ्रमे मनसि (हुनेत्) तत् तु.. ।४३। वैकारिके (हुनेत्) तं मायायां (हुनेत्) । तां स्वस्मिन् (हुनेत्) प्रन्हादः अपि तथा अभवत्।४४।

आतां दत्तप्रभू हा स्वरूपानंद कसा प्राप्त करायचा तो योग सांगत आहेत. 'प्रथम विकल्पाचा चित्तांत लय करावा. ते चित्त मग विषयांत भुलणाऱ्या मनात स्थिरवावे. त्या मनाचा वैकारिक अहंकारांत (पर्यायाने बुद्धीत अथवा विज्ञानमय कोशांत) लय करावा. ती बुद्धी महत्तत्त्वसहित मायेत स्थिरवावी. शेवटी त्या मायेचा आत्म्यांत (**स्वस्मिन्**) विलय करावा. **विकल्प** म्हणजे इंद्रिये आणि **चित्ति** म्हणजे त्यांची विषयाकडची धांव. पहिल्यांदा इंद्रियांना विषयांपासून वळवून मनांत स्थिर करावे. हाच पतंजलींनी सांगितलेला **प्रत्याहार** होय. त्यानंतर ते विषयरहित झालेले मन बुद्धीत विरवावे. हीच **धारणा**. ही स्थिरावलेली बुद्धी महत्तत्त्वांत आणि मायेत विरवावी (**ध्यान**) आणि अंती ती माया आत्मस्वरूपांत स्थिर करावी (**समाधी**). इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, अव्यक्त (महत्, माया) आणि पुरुष ही परंपरा कठोपनिषदांत (१:३:१०) स्पष्ट केली आहे. हीच प्रक्रिया तेथे पुढीलप्रमाणे सांगितली आहे. 'सूज्ञ माणसाने वाचेचा (इंद्रियांचा) संयम मनांत करावा; त्या मनाचा बुद्धीत (*'ज्ञानआत्मनि'*), त्या बुद्धीचा महत्तत्त्वात आणि महत्तत्त्वाचा लय प्रशांत अशा आत्मतत्त्वात करावा (१:३:१३). 'इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, महत्तत्त्व, आणि आत्मा हे एकापेक्षा एक सूक्ष्म, व्यापक आणि आंतरिक आहेत. अशा रीतीने हा अनात्म पदार्थांचा अनुक्रमाने विलय श्रुतीने *'सा काष्ठा सा परा गति'* महणून प्रतिपादलेल्या आत्मरूपांत करावा. 'तो नित्य, शुद्ध, बुद्ध, सर्वभेदातीत परमात्माच मी आहे' हे पक्के झाले की संसारातून मुक्त होशील. हे माझे गूढतम हृदयच मी तुझ्यापुढे उघडे केले आहे. त्याचे सावधानतेने मनन कर. हे माझे हार्द अत्यंत नम्र आणि श्रद्धावंतालाच सांगावे.' हे स्वतःला हृदयांत सामावणारे रहस्य सांगून दत्तप्रभू निःशब्द झाले. प्रह्लादही त्या उपदेशाने प्राप्त झालेल्या अनुभवाने तसाच - निःशब्द आणि तटस्थ झाला.

**देवोऽर्जुनायापि योगं प्राहाष्टाङ्गं निवृत्तये । सद्वाच्याविद्याशबल-ब्रह्मातोऽव्यक्तकं महत् ।।४५।।**

देवः अर्जुनाय अपि निवृत्तये अष्टाङ्ग+योगं प्राह। सत्+वाच्य अविद्या+शबल+ब्रह्मातः अव्यक्तकं, (अव्यक्तात्)महत् ।४५।

आतां कार्तवीर्य अर्जुनाचा अनुग्रह सांगत आहेत. देव याचा अर्थ द्योतनात्मक म्हणजेच स्वयंप्रकाश दत्तप्रभू असा आहे. 'त्याच्या प्रकाशानेच हे सर्व उजळलेले आहे,' या मुंडकोपनिषदाच्या (२:२:१०) आणि 'जे सूर्य, चंद्र आणि अग्नी यांच्यांत प्रविष्ट झालेले तेज आहे ते माझेच आहे' ह्या गीतावचनाचा (१५:१२) हाच अभिप्राय आहे. कार्तवीर्याला संसारातून निवृत्त होण्यासाठी दत्तप्रभूंनी अष्टांगयोगाचा उपदेश केला. त्यांपैकी, पातंजल दर्शनानुसार अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम आणि तप, संतोष, शौच, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान हे पांच नियम ही पहिली दोन अंगे आहेत. शांडिल्य उपनिषदांत आणि सूतसंहितेत अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, आर्जव, क्षमा, धृति (धैर्य), मिताहार, शौच हे दहा यम तसेच तप, संतोष, आस्तिक्य, सिद्धान्तश्रवण, ईश्वरपूजन, दान, ह्री (लज्जा), मति (सद्बुद्धी), जप आणि व्रताचरण हे दहा नियम मानले आहेत. ह्यांची लक्षणे विस्तारभयाने दिली नाहीत. ती त्या त्या ग्रंथांतून पाहावीत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे. कुणी यम आणि नियम हे स्वाभाविक मानवधर्म असल्याने उरलेली सहाच अंगे मानून 'षडंग' योगाचे प्रतिपादन करतात तर कुणी समाधी हे योगाचे फळ मानून 'सप्तांग' योगाचे प्रतिपादन करतात. ह्या ठिकाणी भगवंतांनी, समाधीचे सविकल्प आणी निर्विकल्प असे दोन भाग करून, एकाचा समावेश अंगांत करून 'अष्टांग' योगाचा उपदेश केला आहे.

**निवृत्तये** या शब्दांतून अध्यारोपजनित संसाराचा अपवादाने निरास करून त्यापासून मुक्त होणे हा अर्थ सुचविला आहे. ह्या अध्यारोपाचे स्पष्टीकरण पुढे सत् या पदापासून *'सदेव सोम्य इदमग्र आसीत्'* ह्या छांदोग्य उपनिषदाच्या वचनाद्वारे सांगितले आहे. सत् म्हणजे जो सदैव, तिन्ही काळात असतो तो, म्हणजेच आत्मा होय.

**ततस्ततोऽहङ्कारोऽस्मात् पञ्चतन्मात्रखाद्यतः । जगत्सकार्यविकृत-भूतान्युर्वात्मवर्ष्म तत् ।।४६।।**

ततः अहङ्कारः, अस्मात् ख्आदि पञ्च+तन्मात्र, अतः जगत् । स+कार्य+विकृत+भूतानि उरु+आत्म+वर्ष्म । तत् ।४६।

छांदोग्यातच पुढच्या अनेक मंत्रांत सदेव न म्हणता *'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किञ्चन मिषत्'* असे म्हटले आहे. यावरून देश, काल, वस्तू या त्रिविध परिच्छेदविरहित आत्माच 'सत्' शब्दाने अभिप्रेत आहे. 'अतति' सर्वत्र जाणारा किंवा सर्वांना व्यापणारा तो आत्मा. त्यालाच नित्य, शुद्ध, बुद्ध इत्यादि लक्षणांचे निरतिशय ब्रह्म ('बृह' धातूपासून वाढणारे) म्हणतात. प्रलयकाली आधीच्या सृष्टीतील सर्व प्राणिमात्रांनी केलेली पण परिपक्व न झालेली कर्मे, मायाविशिष्ट ब्रह्मात राहून हळूहळू पचत (पिकत) असतात. त्या कर्मांनाच अविद्या म्हणतात. आणि त्यांनी युक्त असलेल्या ब्रह्माला 'अविद्याशबलब्रह्म' म्हणतात. हीच कर्मे परिपक्व झाली की त्यांचा भोग देण्यासाठी ह्या ब्रह्माला पुन्हा जगत् निर्माण करण्याची इच्छा होते. हाच ऋग्वेदांत (१०:१२९:४) प्रतिपादलेला सर्वप्रथम प्रकटणारा 'काम म्हणजेच मनाचे बीज' होय. हेच शबलब्रह्म जगाचे अभिन्न निमित्त आणि उपादान कारण आहे. हेच स्वतःपासूनच जग निर्माण करते. घटाला जसे माती हे उपादान कारण आहे आणि कुंभार हे निमित्त कारण आहे तशी दोन कारणे सृष्टीला नाहीत. ह्या ब्रह्मापासून अव्यक्त म्हणजे माया जन्म घेते आणि मायेपासून महत् नांवाचे तत्त्व निर्माण होते. महत्तत्त्वापासून अहंकार, अहंकारापासून पंचतन्मात्रासहित आकाश, वायू, तेज, आप आणि पृथ्वी ही पंचमहाभूते उत्पन्न होतात. आतां कुणी विचारतील की तैत्तिरीय उपनिषदात (२.१.१) तर 'आत्म्यापासून आकाश संभवते' असे म्हटले आहे. तर अव्यक्त शब्दाने दर्शविलेली माया ब्रह्माची शक्तीच आहे. तिला स्वातंत्र्य नाही. 'न तस्य कार्यं कारणं च विद्यते' असे श्वेताश्वतरोपनिषदांत म्हटलेच आहे. इथे अव्यक्तांतच अंतर्भूत असलेल्या महत् आणि अहंकार यांचा स्पष्ट वेगळा उल्लेख केला आहे एवढेच. आत्म्यापासून आकाश जन्म घेते या श्रुतिवाक्याशी कसलाच विरोध नाही.

आरंभवाद आणि परिणामवाद यांचे खंडन इथे विस्तारभयाने केले नाही. हे सर्व ब्रह्मसूत्रभाष्याच्या दुसऱ्या अध्यायात पाहावे.

**जागृतिर्गोभिरर्थाप्तिर् विश्वस्तदभिमानवान् । सकार्यशुद्धभूतानि लैङ्गात्मात्मा स भौतिकः ।।४७।।**
**हिरण्यगर्भः स्वप्नः स्यात् करणोपरमेऽर्थयुक् । प्राक्संस्कारोत्थानुभूतिस् तैजसोऽत्राभिमानवान् ।।४८।।**

गोभिः अर्थ+आप्तिः जागृतिः । विश्वः तत्+अभिमान+वान् । स+कार्य+शुद्ध+भूतानि लैङ्ग+आत्मा सः भौतिकः ।४७। हिरण्य+गर्भः स्वप्नः स्यात् करण+उपरमे+अर्थ+युक् । प्राक्+संस्कार+उत्थ+अनुभूतिः तैजसः अत्र+अभिमान+वान् ।४८।

अगदी शेवटच्या कार्यापर्यंत आत्माच सर्वांचे उपादान कारण असल्याने अव्यक्तापासून म्हणजे अव्यक्तभावाला प्राप्त झालेल्या आत्म्यापासून असे समजावे. आकाशादि पांच महाभूतांपासून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणांची वाढ झाली. म्हणून पंचमहाभूतांपासून जगत् झाले. **कार्या**सहित म्हणजेच विषयांसहित **विकृत** म्हणजे पंचीकृत भूतांपासून स्थूल देह (**'उरुवर्ष्म'**) आणि विराट (**'तत्'**) उत्पन्न झाले.

या स्थूल देहांत **'गो'** म्हणजे इंद्रियांपासून **'अर्थाप्ति'** म्हणजे विषयांचे ग्रहण ज्या अवस्थेत होते ती जागृती अवस्था होय. स्थूल देह आणि जागृती यांचा अभिमानी जीवाला **'विश्व'** म्हणतात. शुद्ध म्हणजे अविकृत, अपंचीकृत महाभूतें आणि त्यांची कार्ये पंचतन्मात्रा यांचा मिळून आत्म्याचा लिंगदेह, ज्याला सूक्ष्म देह असेही म्हणतात, तो होतो. तो स्थूलदेहाप्रमाणेच भौतिक (भूतांपासून झालेला) आहे.

समष्टीच्या लिंगदेहालाच **हिरण्यगर्भ** असे नांव आहे. इंद्रियांचा उपशम झाला की हा सूक्ष्म देह पूर्वीच्या (**प्राक्**) जागेपणीच्या संस्कारांच्या स्मृतीने विषयांचा अनुभव घेतो. तीच **स्वप्ना**वस्था होय. लिंगदेह आणि स्वप्नावस्था यांच्या अभिमानी जीवाला (जाग्रतीतल्या विश्वालाच) **'तैजस'** असे नांव आहे. बृहदारण्यकांत (४.३.९) या अवस्थेत पुरुष (जीव) स्वयंप्रकाश होतो, स्वप्नांतील सृष्टीची रचना तोच करतो असे म्हटले आहे.

**द्विहेत्वात्मावित्साभासा-ऽव्याकृतं ज्ञानसंहृतिः । धीहेत्वात्मस्थितिः सुप्तिर्मानी प्राज्ञोऽत्र तत्परम् ।।४९।।**

द्वि+हेतू आत्म+अवित्स +आभासा अव्याकृतम् । धी+हेतु+आत्म+स्थिति सुप्तिः । अत्र प्राज्ञः । तत्+परं।४९।

ह्या दोन (**'द्वि'**) देहांचे कारण (**'हेतू'**) असणारे आत्म्याचे अज्ञान (**'आत्म+अवित्'**) आणि आभासरूप जीव (**'स+आभासा'**) यांना **अव्याकृत** ही संज्ञा आहे. अस्पष्ट दशेत असलेले म्हणजे अव्याकृत. स्पष्टपणे व्यक्त न झालेले, आकाराला न आलेले ते अव्याकृत! *'तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्'* (बृहदारण्यक उ. १.४.७) ह्या श्रुतीप्रमाणे उत्पत्तीच्या पूर्वी जग अव्याकृत असते. त्या वेळी पंचभूतादींचे हे जग सत्याचे अधिष्ठान जे ब्रह्म त्यांत रोंवलेले असते. ह्याचा आत्मतत्त्वाच्या ज्ञानाने लय होत असल्याने त्याला 'सत्' म्हणजे खरे म्हणतां येत नाही, पुढे दृश्य स्वरूपांत व्यक्त होणार असल्याने 'असत्' म्हणजे खोटे म्हणतां येत नाही. सत् आणि असत् हे परस्परविरोधी धर्म असल्याने त्याला 'सदसत्' असेही म्हणतां येत नाही. आत्मस्वरूपापासून त्या अव्याकृताला भिन्न म्हणावे तर द्वैत मानावे लागते आणि आत्म्याच्या श्रुतिप्रतिपादित अद्वितीयत्वाला बाध येतो. त्याला आत्म्याशी अभिन्न मानले तर त्यांच्यासारखा आत्माही जड ठरतो. भिन्न आणि अभिन्न ह्या दोन्ही परस्परविरोधी स्थिती एकत्र असूं शकत नाहीत म्हणून त्यांना भिन्नाभिन्नही म्हणतां येणार नाही. हे अव्याकृतच पुढे जगात परिणत होत असल्याने त्याला निरवयव म्हणतां येत नाही. आकाशादि निरवयवांचीही उत्पत्ती त्यापासून होत असल्याने त्याला सावयवही म्हणतां येत नाही. अशा रीतीने अव्याकृताला **अनिर्वचनीय** म्हणावे लागते. तेसुद्धा ब्रह्माशी ऐक्याच्या ज्ञानाने नाहीसे होते. हाच **कारणदेह** होय. सर्व प्रकारच्या ज्ञानांचा उपसंहार (**ज्ञानसंहृतिः**) होऊन बुद्धी (**धियो**) कारणदेहात स्थिरावते ती सुषुप्ती (**निद्रा**) अवस्था जाणावी. कारणदेह आणि सुषुप्ती यांचा अभिमानी झालेला जीव **प्राज्ञ** म्हणवतो. तैजसाचाच सुषुप्तीत प्राज्ञ होतो. इथे स्पष्टपणे सांगितलेला नसला तरी विश्व, तैजस आणि प्राज्ञ यांच्यातला अभेद लक्षांत घेतला आहे. जगाच्या कारणरूपाने प्राज्ञ नांवाच्या आत्म्याचे चिंतन करावे (*'जगत्कारणरूपेण प्राज्ञात्मानं विचिन्तयेत्।'*) असे श्रीमच्छंकराचार्यांच्या पंचीकरणावरील वार्तिकांत (श्लोक ४५). **तत्परं** हे पद पुढच्या श्लोकाला जोडून वाचावे.

**शुद्धादिलक्ष्मचिन्मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते । यमादिवान्पीठवित्सद्-गुरूक्त्यापूर्य चेडया ।।५०।।**

(तत्+परं) शुदाध+आदि+लक्ष्म+चित्+मात्रं ब्रह्म वाक्येन लक्ष्यते यम+आदि+वान् पीठ+वित् सत्+गुरु+उक्त्या चेड्या आपूर्य.. ।५०।

बुद्धी कारणदेहांत स्थिरावली की वृत्ती उठत नाहीत. वृत्तींवर बुद्धीचा प्रभाव असतो तसाच बुद्धीच्या साक्षीचा - प्रत्यगात्म्याचाही, असतो. बद्धीतून उद्भवणाऱ्या सर्व वृत्ती तापलेल्या लोखंडाच्या ठिणग्यांसारख्या आत्म्याच्या चैतन्याच्या स्पर्शाने तेजाळलेल्या असतात (तैत्तिरीय उ. भाष्यवार्तिक). अशी ही बुद्धी वटवृक्ष जसा वडाच्या बीजांत सामावावा तशी कारणदेहांत सामावून राहते. आतां त्यांच्या म्हणजे जाग्रती, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या पलीकडे असलेले शुद्ध, बुद्ध, नित्य इत्यादि लक्षणांनी युक्त असे चैतन्यमात्र ब्रह्म गुरूंनी उपदेशिलेल्या *'तत्त्वमसि'* (ते ब्रह्म तू आहेस) ह्या महावाक्याने लक्षिले जाते.

श्लोकाच्या उत्तरार्धापासून हठयोगाचे निरूपण केले आहे. **यमनियम** अंगी बाणविलेल्या आणि आसनाचा जय केलेल्या साधकाने गुरूंच्या निर्देशाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली पुढे सांगितलेल्या प्राणायामाचा अभ्यास करावा. कठोपनिषदांतील (१.२.९) सिद्धांताप्रमाणे आपली 'बुद्धी चालवून योगाभ्यास करूं नये'. *'ईडया आपूर्य'* ही पदे पुढच्या श्लोकाशी जोडून वाचावीत.

**ईडा** या डाव्या नाकपुडीने बाहेरचा प्राण जोराने आंत ओढून पूरकाच्या चौपट काळ जालंधरबंधाने (गळा छातीशी दाबून घरून) पोटांत धरून ठेवावा, म्हणजेच **कुंभक** करावा. हा कुंभक जपसहित वा नुसता (जपरहित) करतां येतो. नंतर दुसऱ्या म्हणजे उजव्या **पिंगला** नाडीद्वारा उड्डियान बंध लावून (पोट आंत ओढून), हळूंहळूं प्राण बाहेर सोडावा, म्हणजेच **रेचक** करावा. वेगाने किंवा जोरांत रेचक केल्यास बलहानी होऊ शकते. दुसरा प्राणायाम उलट रीतीने, म्हणजे पिंगलेने पूरक आणि इडेने रेचक करावा. नंतर पुन्हां पहिल्यासारखा असे दहा कुंभक दिवसांतून तीन वेळां करीत गेल्याने तीन महिन्यांत प्राणजय होतो. जिंकलेल्या प्राणाने इंद्रिये विषयांपासून मनांत बांधावी. हा **प्रत्याहार** होय.

**धारयेदात्मन्यचलं विक्षिप्तं शश्वदात्मनि । स्थिरीकुर्वन्छ्रुतं ध्यायेच्छ्रुतियुक्त्या निरासतः ।।५२।।**
**विजातिप्रत्ययस्यान्य-प्रवाहीकरणं भजेत् । गुरूक्तं षड्लिङ्गवित्तं तं भागत्यागलक्षितम् ।।५३।।**

आत्मनि अचलं धारयेत् । विक्षिप्तं शश्वत् आत्मनि स्थिरीकुर्वन् श्रुतं ध्यायेत् । श्रुति+युक्त्या निरासतः... ।५२। (श्रुति+युक्त्या निरासतः) विजाति+प्रत्ययस्य अन्य+प्रवाही+करणं भजेत् । गुरु+उक्तं षड्+लिङ्ग+वितं भाग+भाग+त्याग+लक्षितं ।५३।

चित्त स्थिर करून नाभ्यादि देशांत धरून ठेवावे. मग ते मन *'देशबन्धश्चित्तस्य धारणा'* या पतंजलींच्या वचनानुसार हीच **धारणा** होय. दैवयोगाने मन विक्षिप्त (चंचल) होऊन विषयांत गुंतले तर सारखा पुनःपुन्हा अभ्यास करून ते स्थिर करावे आणि गुरूंकडून श्रवण केलेल्या तात्पर्याचे, आत्मस्वरूपाचे ध्यान करावे.

**तात्पर्यनिर्णयाचे सहा निकष -** श्रुतींना, वेदांना अनुकूल अशा युक्तीने, तर्काने द्वैताच्या संस्कारांचे निरसन करीत, गुरुमुखांतून श्रवण केलेल्या, उपनिषदांत प्रतिपादलेल्या, अद्वैत आणि प्रत्यगात्म्याशी एकरूप असलेल्या परब्रह्म स्वरूपाच्या अनुभूतीत प्रवाहित करावे. गुरूंनी वेदांतवाक्याने उपदेशिलेले ब्रह्मरूप वेदांताच्या अभ्यासानेच जाणून घ्यावे, कारण *'तत्तु समन्वयात्'* या ब्रह्मसूत्रानुसार वेदांतांतच ब्रह्मरूपाचे प्रतिपादन आहे. या गुरूपदिष्ट ब्रह्मरूपाचे तात्पर्य श्रीमदादिशंकराचार्यांनी सांगितल्याप्रमाणे उपक्रमादि सहा लिंगांच्या आधारेच करावे. *'उपक्रमोपसंहारावभ्यासोऽ पूर्वता फलम्। अर्थवादोपपत्तौ च लिङ्गं तात्पर्यनिर्णये।'*. छांदोग्योपनिषदांत ब्रह्माविषयी केलेल्या प्रतिपादनांत 'सदेव सोम्य' असा 'उपक्रम' करून (६.२.१) *'स आत्मा तत्त्वमसि'* असा 'उपसंहार' केला आहे हे पहिले लिंग (१). वरचेवर अनेक वेळां आलेले 'तत्त्वमसि' (ते ब्रह्म तू आहेस) हे वाक्य म्हणजे अभ्यास नांवाचे लिंग आहे (२). शब्दावांचून (प्रत्यक्ष, अनुमान आदि) अन्य प्रमाणानी त्या ब्रह्माचे ज्ञान होत नाही ही 'अपूर्वता' हे तिसरे लिंग आहे (३). हा एक आत्मा जाणला की सर्व जाणले जाते हे 'फल' होय (४). जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय, त्यांत प्रवेश आणि त्याचे नियमन हे पांच 'अर्थवाद' होत (५). मृत्तिका, सुवर्ण आदि दृष्टांत हे उपपत्ती नांवाचे सहावे लिंग आहे (६).

**तत्त्वमस्यादिवाक्यार्थं सोऽहमात्मेत्यभेदतः । नादेयं नश्वरं चित्तं लये सम्बोधयेत्पुनः ।।५४।।**

भाग+त्याग+लक्षितं तत्+त्त्वं+असि+आदि+वाक्य+अर्थम् सः अहं आत्मा इति अभेदतः नश्वरं न आदेयम्। लये पुनः सम्बोधयेत्।५४।

पुराणातही (बृहत्संहिता) 'गुरुमुखांतून वेदांतवाक्यांचे श्रवण केल्यावर उपक्रमादिलिंगांनी त्यांच्या तात्पर्याचा निश्चय करावा. नंतर त्या वाक्याच्या अनुसंधानाने तो अर्थ ग्रहण करणारे मनन करावे. श्रवण आणि मनन यांच्यातील एकाग्रता म्हणजे निदिध्यासन. आत्मज्ञान उत्पन्न होण्यासाठी बुद्धिमान साधकाने विविध तर्कांनी तटस्थ आणि 'अतत्' संस्कारांची व्यावृत्ती करीत, अंतरंग श्रवण, मनन आणि चिंतन ही केली पाहिजेत. तसेच शमदमादि षटकाचाही अभ्यास करावा.' ह्याच श्रवण-मनन-निदिध्यासनांचा निर्देश कहोळ ब्राह्मणात याज्ञवल्क्यांनी 'पांडित्य, बाल्य आणि मौन' या शब्दांनी केला आहे. 'बाल्य' याचा बालवय किंवा निर्बंध स्वैराचार असा होऊ शकत नाही कारण हे दोन्ही मननाला उपयोगी तर नाहीतच पण प्रतिबंधकच आहेत. *'अनाविष्कुर्वन्नन्वयात्'* ह्या ब्रह्मसूत्रानुसार (३.४.५०) राग, द्वेष, मान, अपमान ह्यांच्या प्रभावाने होणाऱ्या बाह्य प्रवृत्तीचा त्याग करून निरागस, शुद्ध भावांत राहण्याला बाल्य म्हटले आहे. 'ब्राह्मणाने (श्रवणाने) पांडित्य पूर्णपणे संपादन करून (मननाचा अभ्यास करीत) 'बाल्य'त्वाने राहावे. बाल्य आणि पांडित्य आत्मसात केल्यावर (निदिध्यासनासाठी) 'मौन' धरावे.' (बृहदारण्यक उ. ३.५.१). यांत मौनाचा ब्रह्मसूत्रानुसार (३.४.४७) विध्यात्मक अर्थ घ्यावा. अंतःकरणातून बलिष्ठ भेदवासनांचा प्रभाव नाहीसा करण्यासाठी ज्ञानाभ्यास निरंतर चालविण्यासाठी निदिध्यासनात्मक मौन धारण करायचा विधि सांगितला आहे. ध्यान वरचेवर करावे लागते. म्हणजे त्याची आवृत्ती करावी लागते. कोंडा बाजूला होईपर्यंत साळी कांडाव्या लागतात त्याचप्रमाणे ब्रह्मसाक्षात्कार होईतोंवर *'आवृत्तिरसकृदुपदेशात्'* या ब्रह्मसूत्राला (४.१.१) अनुसरून श्रवणादींची आवृत्ती आवश्यकच आहे. *'भागत्यागलक्षितम्'* हे पद पुढच्या श्लोकांतल्या 'तत्त्वमस्यादिवाक्यार्थम्' या पदाचे विशेषण आहे.

भागत्यागलक्षणेने सूचित होणाऱ्या 'ते तू आहेस' या वाक्याचे 'तो (आत्मा) मी आहे' असे अभेदतया चिंतन करावे. शब्दाचा अर्थ तीन प्रकारे लावतां येतो, मुख्य, गौण आणि लक्षणा. ब्रह्म हे अनिर्वचनीय असल्याने त्याचा मुख्य किंवा गौण अर्थ लावतां येत नाही. यासाठी लक्षणा वृत्तीनेच अर्थ लावला पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत 'ते' व 'तू' या पदांची समानता ('सामानाधिकरण्य') दिसते. श्रीमच्छंकराचार्यांनी वाक्यवृत्तीत (४७) सांगितल्याप्रमाणे मुख्यार्थ घेतल्याने जर प्रमाणाशी विसंगत अर्थ निघत असेल, मुख्यार्थाविना येणाऱ्या प्रतीतीला लक्षणा म्हणतात. म्हणजेच 'तत्' आणि 'त्वं' पदांचा परस्परसंबंध 'लक्ष्य' आणि 'लक्षणा' असा होतो. लक्षणा तीन प्रकारची असते. जहती, अजहती आणि भागत्याग (*जहत्यजहती*). ज्या वेळी मुख्यार्थ पूर्णपणे सोडून वेगळाच अर्थ काढला जातो तिला *'जहल्लक्षणा'* असे म्हणतात. उदाहरणार्थ गंगेतला गोठा (*'गंगायां घोषः'*) इथे वाहत्या नदीत गोठा असूं शकत नाही. म्हणून गंगेचा नदी हा अर्थ सोडून नदीचा कांठ असा अर्थ घेतल्यावर तो बरोबर जुळतो. लक्षणेच्या दुसऱ्या प्रकारांत मुख्यार्थाला जोडून आणखी अर्थ घ्यावे लागतात. ही 'अजहल्लक्षणा' होय. उदाहरणार्थ 'कावळ्यापासून अन्न राख' याचा अर्थ केवळ कावळेच नाही तर इतर सर्व प्राण्यापासूनही अन्नाचे रक्षण करावे असा केला पाहिजे. अन्यथा कावळे सोडून इतर प्राण्यांना अन्न खाऊ द्यायला मोकळीक आहे असा अर्थ निघेल. ह्या दोन्ही लक्षणा महावाक्याला लागत नाहीत. कारण ते आणि तू या पदांचे लक्ष्यार्थ एक असू शकत नाहीत आणि सर्वथा वेगळेही असू शकत नाहीत. यासाठी दोन्ही पदांचे समान अंश ग्राह्य धरून असमान अर्थ टाकले तर 'लक्ष्यार्थ' स्पष्ट होतो. जुना मित्र अनेक वर्षांनी भेटला की त्याची ओळख पटण्यासाठी 'तो हा देवदत्त' असे सांगावे लागते. फार पूर्वी दूरदेशी तरुणावस्थेत ज्याच्याशी मैत्री झाली तोच हा वृद्ध आत्तां इथे भेटतोय असा त्याचा अर्थ होतो. त्याचे वय, रूप, स्थान इत्यादि वेगळे आहेत पण नांव आणि मित्रत्व तसेच आहेत. अशा भिन्न किंवा विसंगत अर्थ सोडून उरलेल्या समान आणि सुसंगत अर्थांनी ओळख पटते. 'ते तू आहेस' या वाक्यात 'ते' पदाचा अर्थ मायेत प्रतिबिंबित झालेला ईश्वर आणि मायेचे अधिष्ठान ब्रह्म, असा वाच्यार्थ आहे आणि सत्य, ज्ञान, अनंत इत्यादि लक्षणांनी निर्दिष्ट चैतन्य हा 'लक्ष्यार्थ' आहे. 'तू' पदाने अविद्या, तिच्यात

प्रतिबिंबित झालेला जीव आणि अविद्येचे अधिष्ठान कूटस्थ चैतन्य हा वाच्यार्थ आणि साक्षीभूत चैतन्य हा लक्ष्यार्थ आहे. वरील देवदत्ताच्या उदाहरणाप्रमाणे इथे 'ते' आणि 'तू' या पदांचे वाच्यार्थ भिन्न असले तरी लक्ष्यार्थ निःसंशय एकच आहे. वस्तुतः ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला अंतःकरणाच्या उपाधींमुळे दुःखादि सांसारिक धर्म चिकटलेले भासतात.

**सोऽहमात्मेत्यभेदतः -** हा विरोध वास्तविक नसल्याने 'तो(च) मी आहे' असा त्यांचा अभेदच आहे. ब्रह्मसूत्रानुसार (४.१.३) श्रुतींनीही आत्मा शब्द ब्रह्म ह्या अर्थानेच स्वीकारला आणि प्रतिपादला आहे. अशा प्रकारें मनन आणि निदिध्यासन केल्यानेच आत्मसाक्षात्कार होतो. यावर असा आक्षेप घेतां येईल की वेदानुसार (केनोपनिषद १.५) तर आत्मा मनाचा विषय होऊं शकत नसल्याने त्याचे मनन कसे होईल? स्वयंप्रकाश आत्म्याला मन प्रकाशत नाही हे खरेच आहे. पण हा निषेध फक्त फलव्याप्तीचा आहे. इतर वस्तूंच्या मननाने ती वस्तू मनांत आकारते. हीच फलव्याप्ती. पण आत्मज्ञानासाठी वृत्तिव्याप्तीच पुरेशी आहे. अंधारांत पडलेली दोरी पहायला दिवा लागतो. दिवा मात्र इतर प्रकाशाच्या साधनाविना दिसतो. तसाच आत्म्याचा प्रकाश मनांत पडल्याने तो जाणवतो. ह्यालाच 'वृत्तिव्याप्ती' असे म्हटले आहे. त्यामुळेच बृहदारण्यक उपनिषदांत आत्मा 'मनानेच पाहावा' असे या अर्थानेच म्हटले आहे. पंचदशीतही (७.९२) म्हटले आहे, 'ब्रह्माच्या अज्ञानाचा नाश करण्यासाठी वृत्तिव्याप्तीचीच अपेक्षा आहे. ब्रह्म स्वतःच (अंतःकरणात) स्फुरत असल्याने त्याचा आभास होऊंच शकत नाही.' अभेदतः ह्या शब्दाने जीवात्मा (प्रत्यक्) आणि (पर)ब्रह्म यांची अखंडैकरसता सुचविली आहे. वाक्यवृत्तीत (३९-४१) सांगितल्याप्रमाणे, 'प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार अद्वितीय आणि आनंदघन असाच होतो. अद्वयानंदस्वरूप ब्रह्म हेच प्रत्यग्बोधाचे लक्षण आहे. आत्मा आणि ब्रह्म यांचे असे परस्पर तादात्म्य पक्के झाले की 'त्वं' पदाच्या अर्थाचे (जीवाचे) ब्रह्मापासून वेगळेपण आणि 'तत्' पदाची परोक्षताही तत्काल दूर होतात. तदनंतर जीवात्म्याची जाणीव पूर्णानंद अद्वितीय रूपानेच स्थिर होते.' जीवात्मा आणि परमात्मा यांचे अखंड एकरसत्व केवळ परस्पर तादात्म्यानेच सिद्ध होत नाही ह्या आक्षेपाचे निराकरण करण्यासाठी नीलकमलाचा

दृष्टांत देतात. नील आणि कमल ह्या दोन पदांत 'नील' हे विशेषण व 'कमल' हे विशेष्य असून त्यांचा मिळून अर्थ 'निळ्या रंगाचे कमळ' असा होतो. हे त्यांचे तादात्म्य असले ते अखंडैकरस नाहीत. नील हा गुण आहे आणि कमल हे द्रव्य आहे, हा भेद कायमच आहे. तसाच आत्मत्व आणि ब्रह्मत्व ह्यांच्यातला भेद राहणारच असे म्हणाल तर ते तसे नाही. नीलता ही कमळाशिवाय मेघ आणि इतर वस्तूंतही आढळते. तसेच कमळ हे लाल, पांढरे असे इतर रंगाचे असूं शकते. अर्थात् त्यांच्या अर्थांतच भेद असल्याने अखंडार्थ होऊं शकत नाही. आत्मत्व आणि ब्रह्मत्व हे मात्र एकमेकांशिवाय कुठेच आढळत नाही. विश्वरूपाचार्यांनी वाक्यवृत्तीत म्हटल्याप्रमाणे, 'आत्मता ही ब्रह्माशिवाय अन्य ठिकाणी आढळत नाही आणि ब्रह्मता आत्म्यावांचून कुठेच दिसत नाही. नीलोत्पलापेक्षां हे विलक्षण आहे.'

**नादेयं नश्वरं -** समाधीलाभासाठी ध्यानमार्गाचा अभ्यास करणाऱ्याला अष्टमहासिद्धींचे ऐश्वर्य हे विघ्नच आहे. त्याचा अंगीकार करूं नये.

**चित्तं लये सम्बोधयेत्पुनः -** ध्यानाभ्यास करतांना तमोगुणामुळे कदाचित् चित्ताचा लय होऊं लागला - झोंप येऊं लागली, तर त्याला पुनश्च जागवावे.

**विक्षिप्तं शमयेज्जह्यात् सकषायं समं वरम् । नास्वादयेद्रसं तत्र निःसङ्गः प्रज्ञया भवेत् ।।५५।।**
**निवातदीपवच्चित्तो ब्रह्मात्मा शून्यवृत्तिकः । कृतकृत्यः क्षीणकर्मा भिन्नहृद्ग्रन्थिसंशयः ।।५६।।**

निवात+दीपवत्+चित्तः ब्रह्म+आत्मा शून्य+वृत्तिकः कृत+कृत्यः क्षीण+कर्मा भिन्न+हृत्+ग्रन्थि+संशयः।५६।

**विक्षिप्तं शमयेत्** इतर विषयांच्या ओढीने चित्त चंचल झाले तर त्या विषयांचे चिंतन सोडून ते शांत करून परत ध्यानांत लावावे; **सकषायं जह्यात्** वासनांनी मलिन झाले तर त्या वासनांचा त्याग करावा. **समं वरम्** विक्षेप आणि कषाय यांनी रहित असेल तर उत्तमच! तेच ध्यानांत स्थिर करावे. **रसं न आस्वादयेत्** त्या ध्यानाच्या अवस्थेत जो आनंद स्फुरतो त्याच्या आस्वादांत रमू नये. त्याच्यापुढे जायचे आहे हे लक्षांत ठेवावे. अशा रीतीने साक्षात्कार होईपर्यंत ध्यान स्थिर करून (**प्रज्ञया निःसङ्गः भवेत्**) बुद्धीने निःसंग व्हावे.

अशा प्रकारे ध्यानाभ्यास करीत निवातीच्या दिव्यासारखे मन स्थिर करावे. हीच समाधी! पंचदशीत (१:५५) सांगितल्याप्रमाणे ध्याता आणि ध्यान ह्यांचा विसर पडून केवळ ध्येयाचेच भान राहून मन निवातीच्या दीपज्योतीप्रमाणे स्थिर होण्यालाच समाधी असे नांव आहे. श्रीमद्भवद्गीतेतही (६:१९) *'यथा दीपो निवातस्थो नेऽङ्गते सोऽपमा स्मृता'* असेच समाधीचे वर्णन केलेले आहे. पतंजलींनी *'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्'* या सूत्रांतून (१:३) ह्याच अवस्थेचा निर्देश केला आहे. **ब्रह्मात्मा** म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदाच्या वचनानुसार (४:४:६) ब्रह्मरूप होऊन ब्रह्मांत मिळून जाणे. हाच अभ्यास पक्का झाला की वृत्तींचा पूर्ण लोप होतो (**शून्यवृत्तिकः**). अशा रीतीने आत्मज्ञानाने गीतावाक्याप्रमाणे (१५:२०) जीव कृतकृत्य होतो. असे हे तत्त्वाचे ज्ञान झाल्यानंतर आपण कांही कर्म केलेच नाही, करीत नाही व करणारही नाही असा अकर्त्या ब्रह्माशी एकरूपतेचा निर्धार झाल्यानंतर ब्रह्मसूत्राच्या प्रतिपादनानुसार (४:१:१३) झालेल्या वा होणाऱ्या कोणत्याच पापाचा लेशही त्याला स्पर्शत नाही. तसेच ब्रह्माच्या वस्तुसामर्थ्यामुळे औपनिषद सिद्धांताला (बृ.उ. ४:४:२२) आणि वेदांतसूत्रांना (४:१:१४) अनुसरून पुण्यही त्याला लागत नाही. ('नेदों लागों पापपुण्य अंगा'. संत तुकाराम). त्याच्या चित्तांतील सर्व गांठी मोकळ्या होतात आणि सर्व संशय फिटतात (मुंडक उ. २:२:८).

**प्रारब्धभोक्तात्मारामो जीवन्मुक्तो भवेद्ध्रुवम् । इत्युक्त्वोपररामेशः कार्तवीर्यस्तथाभजत् ।।५७।।**
**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे दत्तलीलाकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

प्रारब्ध+भोक्ता आत्म+आरामः ध्रुवं जीवन्+मुक्तः भवेत्। इति उक्त्वा ईशः उपरराम। कार्तवीर्यः तथा अभजत्।५७।

**'प्रारब्धभोक्ता'** या पदाने छांदोग्यांत सांगितल्याप्रमाणे (६:१४:२) ज्ञान झाल्यावर लगेच देह पडत नाही हे सूचित केले आहे. ब्रह्मसूत्रांत (४:१:१५) हेच प्रतिपादन आहे. अनारब्ध कर्मांचाच - म्हणजे संचिताचाच नाश होतो प्रारब्धाचा क्षय भोगूनच होतो. त्यामुळे शरीराचा पात होईपर्यंत प्रारब्धकर्म भोगावे लागतेच. भात्यांत असलेला बाण काढणे आणि त्याचे संधान करणे हे तीरंदाजाच्या मनावर असले तरी सोडलेला बाण कांही त्याला परत घेतां येत नाही. त्या बाणाचा वेग कमी झाल्यावरच तो जमिनीवर पडणार. तसेच ज्ञानी पुरुषाच्या प्रारब्धकर्माचे आहे. प्रारब्धानुसार आलेल्या भोगांना तो सादर होत असला तरी त्यांचे त्याला सुख वा दुःख कांहीच नसते हे स्पष्ट करण्यासाठी त्याला **आत्माराम** म्हटले आहे (मुंडक उ. ३:१:४). असा हा ज्ञानी निःसंशय (**ध्रुवं**) जिवंत असतांनाच मुक्त असतो (**'जीवन्मुक्तः'**) आणि देह पडल्यावर त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. देह हा कर्मफलाच्या भोगासाठीच उरलेला असल्याने त्याला ते भोगावेच लागतात; पण ज्ञानी पुरुषाला त्यांचे कांहीच सुख-दुःख नसते. ह्याचा उहापोह ब्रह्मसूत्रांत (४:१:१९) केलेला आहे. यापूर्वी पाहिल्याप्रमाणे प्रतिबंध नसला तर याच जन्मी ज्ञान होते (ब्र.सू. ३:४:५१) श्रुतीत (छां.उ. ८:४:१) आत्म्याला सेतू किंवा तीर म्हटले आहे, त्यावरून कुणी असा अर्थ काढतील की या ब्रह्माला पार करून आणखी कुठल्या तरी स्थानाला ज्ञानी जातो. तर ते तसे नाही. ब्रह्म कांही विशिष्ट बाबतीत सेतूसारखे आहे एवढाच त्याचा अर्थ आहे (ब्र.सू. ३:२:३१). बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:६) देहपातानंतर ज्ञानी पुरुषाच्या प्राणांचे उत्क्रमण होत नाही असे म्हटले आहे. ब्रह्मसूत्रातील निर्देशानुसार (४:२:१२) त्याचे प्राण देहांतच लय पावतात. तापलेल्या तव्यावर टाकलेल्या पाण्यासारखे ते ठायींच जिरून जातात. त्याच्या इंद्रियांचाही लय परमेश्वरांतच होतो. (ब्र.सू. ४:२:१५: प्रश्न उ. ६:५) ब्रह्मरंध्राचा भेद करून जाण्याचे वर्णन उपासकांच्या गतीचे आहे. त्यांना ब्रह्मदेवाबरोबर मुक्ति मिळते.

शुक्लगतीचीसुद्धां ज्ञान्यांना अपेक्षा नाही; कारण त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त दुसरे गन्तव्यच नाही. स्वर्गात जाणाऱ्या जीवांप्रमाणे त्यांना नवीन देह प्राप्त होत नाही. यासाठीच वर **ब्रह्मात्मा** असे म्हटले आहे. छांदोग्यांत (८:३:४) वर्णन केल्याप्रमाणे 'परम ज्योतिरूप प्राप्त करून तो त्या आपल्या मूळ रूपाने प्रकटतो'. ब्रह्मसूत्रानुसार (४:४:४) अपरोक्षानुभवाने प्राप्त होणारे मुक्त स्वरूप हे ब्रह्मापासून वेगळे नाही. म्हणजेच मुक्तीचा अर्थ आपलेच स्वयंसिद्ध आत्मस्वरूप आहे. स्वर्गादिकांप्रमाणे आगंतुक असे कांही नाही (ब्र.सू.३:४:५२). अशा या मुक्त पुरुषाला 'सर्वज्ञत्व, सत्यसंकल्पत्व इत्यादि गुणानी युक्त असा मी आहे' अशी जाणीवसुद्धां होत नाही; कारण ती होण्यासाठी कारणीभूत अविद्या मुळासकट नष्ट झालेली असते. म्हणूनच त्याला शून्यवृत्तिक म्हटले आहे. तो एकाच वेळी सविशेष आणि निर्विशेष ब्रह्माशी एकरूप झालेला असल्याने त्याला काळाचा भेद नाही (ब्र.सू. ४:४:५-७). अशा रीतीने दत्तप्रभूंनी उपदेशाचा समारोप केला आणि कार्तवीर्य अर्जुनाने त्यानुसार आचरण केले.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा चौथा अध्याय इथे पूर्ण झाला.**

**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पंचमोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पुराणोक्तावतारास्तु श्रुता यद्भवतोच्यते । तन्मे शुश्रूषवे व्यासाच्छंस त्वन्याश्च तत्कथाः ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**साधु पृष्टं त्वया वत्स शृणुष्वाऽवहितोऽमलाः । तत्कथा याः पुनन्त्यत्र श्रोतॄन्वक्तारमप्यघात् ।।२।।**

नामधारक उवाच। पुराण+उक्ताः अवताराः तु श्रुताः। यत् भवता उच्यते तत्, अन्याः च तत् कथाः, मे शुश्रूषवे शंस।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स, त्वया साधु पृष्टम्। अमलाः तत्+कथाः अवहितः शृणु, याः अत्र श्रोतॄन् वक्तारं अपि अघात् पुनन्ति।२।

**पंचमाध्यायी दत्तात्रेय ब्राह्मणीच्या भक्तीला। भुलून तियेचा श्रीपादनामा पुत्र झाला।।**
**हरुनि भावांचे अंधत्व तसे पंगुत्व निघाला। तीर्थटणा, लोकोद्धार करायला।।**

विवेक, वैराग्य, शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा आणि समाधान ही षट्संपत्ती आणि तीव्र मुमुक्षा ह्या चार साधनांनी संपन्न असलेला साधकाला गुरूंच्या उपदिष्ट महावाक्यांचे श्रवण, मनन, निदिध्यासन करून आत्मरूपाचा ऐक्यरूपाने साक्षात्कार होतो. परमार्थाला विमुख असलेल्यांना मात्र आपल्या अधिकारानुरूप कर्म, उपासना तसेच योग या साधनांनी प्रथम अंतःकरणाची शुद्धी आणि चित्ताची एकाग्रता संपादन करावी लागते. त्याने अर्थातच शमदमादि षट्संपदाही प्राप्त होतेच. विमुखांना कर्माचा उपदेश केला असला तरी गीतेत सांगितल्याप्रमाणे कर्माची गती गहन आहे. विहित कर्म, निषिद्ध कर्म (विकर्म) तसेच अकर्म (कर्म न करणे) हे सर्व नीट समजून घेतले पाहिजेत. ('कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं ह्यपि कर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहनो कर्मणा गतिः।।' भ.गीता ४:१७). हे कर्माचे तत्त्व ठाउक नसेल तर (विहित) कर्म करायला जावे तर तेच विकर्म होते आणि कधी कधी विकर्म केल्यानेच कर्म घडते. अशा प्रकारे विवेकाने भगवंताच्या प्रीतीसाठी म्हणून केलेल्या कर्मानेच सात्त्विक भक्ताला भगवंताचा कृपाप्रसाद लाभतो हे स्पष्ट करण्यासाठीच ह्या अध्यायाचा आरंभ केला आहे.

**धर्मं गोप्तुं सतस्त्रातुं दुष्टान्हन्तुं युगे युगे । लीलाधाम्नाऽवतरति नाऽन्यत्किञ्चित्प्रयोजनम् ।।३।।**
**दीनान्हीनमतीन्ज्ञात्वा दुर्बलान्नॄन्स कच्चरे । आविरासीत्समुद्धर्तुं प्रेम्णा भक्तिविधित्सया ।।४।।**

युगे युगे धर्मं गोप्तुं, सतः त्रातुं, दुष्टान् हन्तुं लीला+धाम्ना अवतरति। अन्यत् किञ्चित् प्रयोजनं न।३। कच्चरे नॄन् दुर्बलान् दीनान् हीन+मतीन् ज्ञात्वा प्रेम्णा भक्ति+विधित्सया समुद्धर्तुं आविरासीत्।४।

पुराणांतरी वर्णन केलेले मत्स्य-कूर्मादि अवतार ऐकलेले आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या अंती आपण उल्लेखिलेले दोन अवतार ऐकण्यास मी उत्सुक आहे. तर ते अवतार व त्यांच्या इतर कथा विस्ताराने मला सांगाव्यात अशी प्रार्थना नामधारकाने केली आहे.१.

सिद्धमुनी म्हणाले, 'हे वत्सा तू हा प्रश्न फार चांगला विचारलास! त्या चित्ताचा मल घालवणाऱ्या आणि श्रोत्यांना तसेच वक्त्यालाही पापापासून शुद्ध करणाऱ्या त्या कथा आतां लक्ष देऊन ऐक.'२. आपल्या गीतेतील सुप्रसिद्ध प्रतिज्ञेनुसार (४:८) धर्माच्या रक्षणासाठी, साधूंच्या उद्धारासाठी आणि दुष्टांच्या निर्दलनासाठीच भगवंत लीलादेह धारण करून अवतरतात.

**परमेश्वर पक्षपाती आहे कां?** साधूंचा उद्धार करायचा आणि दुष्टांचा मात्र नाश करायचा याने परमेश्वरावर पक्षपात (**वैषम्य**) आणि दुष्टावा (**नैर्घृण्य**) यांचा आरोप करतां येत नाही. आई आपल्या बाळाचे कधी लाड करते तर आवश्यक तेव्हां त्याला मारतेसुद्धां. तसेच सर्वांच्या नियामक अशा परमेश्वराचेही आहे. लालन करतांना तसेच ताडन करतांनाही मातेच्या मनांत कारुण्यच असते तद्वतच जीवांना त्यांच्या पाप-पुण्यांचे फळ देण्यांत जीवांच्या अंतिम कल्याणाचेच विधान ईश्वर करत असतो. बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (३:२:१३) पुण्यवंत त्याने केलेल्या पुण्यकर्माने

**पीठापुरे पूर्वदेशे राजा नाम द्विजो वधूः । सुमतिस्तावुभौ नित्यं श्रीदत्तार्चनतत्परौ ।।५।।**

पूर्व+देशे पीठापुरे राजा नाम द्विजः, वधूः सुमतिः, तौ उभौ श्रीदत्त+अर्चन+तत्परौ।५।

होतो तर पापी त्याच्याच पापकर्माने तसा होतो. भगवद्गीतेत श्रीकृष्ण म्हणतात, जो ज्या प्रकारे मला भजतो त्यानुसारच मी त्याला भजतो (४:११). 'वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् तथा हि दर्शयति।' (२:१:३४) या ब्रह्मसूत्राचा हाच अभिप्राय आहे. त्याचे अन्य कांहीही प्रयोजन नाही कारण भगवंत पूर्णकाम आहेत.३.

मलदूषित कलियुगांतील (**कच्चरे**) मानव दरिद्री, मंदबुद्धी आणि ब्रह्मचर्यादि साधनांचे बल नसलेले आहेत हे जाणून त्यांच्या उद्धारासाठीच परम वात्सल्याने आपल्या विद्या आणि शक्तीसहित, परिपूर्ण ज्ञान-बल-वीर्य धारण करून, परमात्मा शुद्धसत्त्वगुणसंपन्न चिन्मय देहाने भक्तिमार्गाच्या स्थापनेसाठी अवतरला.४.

पूर्वेकडील (आंघ्रांतील) पीठापूर नांवाच्या गांवी आपळराजा नांवाचा ब्राह्मण होता. त्याची पत्नी सुमती नांवासारखी उत्तम बुद्धी असलेली होती. दोघेही पतिपत्नी दत्तभक्त असून ते नित्य दत्तप्रभूंच्या पूजेत रमलेले असत.५.

**एकदैत्यास्य वेश्मार्थि-वेषेणान्नं स्म याचते । दत्तः श्राद्धेऽकृतेप्यस्मै श्राद्धाहेऽन्नं ददौ सती ।।६।।**
**तदा ज्ञात्वा स तद्भावं सर्वात्मा भगवान्विभुः । प्रीतः स्वरूपं साध्व्यै तत्करं धृत्वा व्यदर्शयत् ।।७।।**
**स्रक्कुण्डीडमरूच्छूल-शङ्खचक्रधरोऽब्रवीत् । व्याघ्रचर्मावृतस्त्र्यास्यो जटिलो भस्मभूषितः ।।८।।**
**मातर्द्विजेष्वभुक्तेषु श्राद्धाहेऽन्नं त्वयार्पितम् । हव्यकव्यादबुद्ध्या मे तत्तुष्टोस्मि वरं वद ।।९।।**

एकदा अस्य वेश्मे अर्थि+वेषेण एत्य दत्तः अन्नं याचते स्म। श्राद्ध+अहे श्राद्धे अकृते अपि सती अस्मै अन्नं ददौ।६। तदा सः सर्व+आत्मा भगवान् विभुः तत्+भावं ज्ञात्वा प्रीतः साध्व्यै तत्+करं धृत्वा स्वरूपं व्यदर्शयत्।७। स्रक्+कुण्डी+डमरु+उत्+शूल+शङ्ख+चक्र+धरः व्याघ्र+चर्म+आवृतः त्रि+आस्यः जटिलः भस्म+भूषितः अब्रवीत्।८। '(हे) मातः श्राद्ध+अहे द्विजेषु अभुक्तेषु त्वया हव्य+कव्य+अद+बुद्ध्या मे श्राद्ध+अन्नं अर्पितम्। तत् तुष्टः अस्मि। वरं वद।'९।

एकदा त्यांच्या घरी ब्राह्मण याचकाच्या रूपाने येऊन दत्तप्रभूंनी अन्नाची याचना केली. त्या दिवशी घरी श्राद्ध होते आणि ब्राह्मण जेवायचे होते. तरीही अतिथीला विन्मुख पाठवू नये असा विवेक करून सुमतीने भिक्षेकऱ्याच्या वेषांतील दत्तात्रेयांना अन्न दिले.६. तेव्हा सर्वांतर्यामी, सर्वव्यापी भगवंतांनी तिची ती भक्ती ओळखून अत्यंत प्रेमाने मातृभावाने त्या साध्वीचा हात धरून तिला आपल्या त्रैमूर्त्यात्मक रूपाचे दर्शन दिले.७. तीन मुखे आणि सहा हात असलेल्या प्रभूंनी खालच्या दोन हातांत माला-कमंडलु, मधल्या दोन हातांत डमरू-शूल आणि वरच्या दोन हातांत शंख-चक्र धारण केले होते. भस्माने भूषविलेल्या तनूवर व्याघ्रांबर लपेटले होते आणि मस्तकावर जटाभार रुळत होता. ते दत्तदेव त्या सतीला म्हणाले,(८) 'माई! श्राद्धाच्या दिवशी देवांच्या आणि पितरांच्या निमित्ताने निमंत्रित केलेल्या ब्राह्मणांचे भोजन होण्याआधीच हाच हव्य आणि कव्य यांचा भोक्ता विष्णू आहे (**हव्य+कव्य+अदः**) अशा बुद्धीने (भावाने) ते अन्न मला अर्पण केले त्याने मी संतुष्ट झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे! कितीही दुर्लभ मागणे असले तरी मी ते पुरवीन.'९.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**धन्यास्मि सर्वे पितरोऽपि धन्या यद्यो भवान्योगिमनोविदूरः ।**
**भूत्वाद्य मे दृग्विषयोऽपि पित्र्यं स्वाद्वाददेऽन्नं किमुताधिकं सत् ।।१०।।**
**सृष्ट्यादिहेतो जगतोऽसि भक्त-पुमर्थकल्पद्रुरतोऽर्पयाशु ।**
**मे सुप्रजस्त्वं जनसेवि मातरित्युक्तसम्बोधनसिद्धिपूर्वम् ।।११।।**
**एवं श्रुत्वात्रिवद्याच्ञां प्राह भूयात्तथैव ते । पुत्रस्ते भविता मादृक्तदुक्तिं मा तिरस्कुरु ।।१२।।**
**इत्युक्त्वाऽन्तर्दधे दत्तः सापि वेश्मैत्य हर्षिता । पत्ये शशंस तत्सर्वमुभावपि ननंदतुः ।।१३।।**

ब्राह्मणी उवाच। धन्या अस्मि। सर्वे पितराः अपि धन्याः यत् योगी+मनः+वि+दूरः भवान् मे दृक्+विषयः (अभूत्), (तथा) पित्र्यं स्वादु अन्नं अपि आददे। उत किं अधिक सत्?।१०। (हे) जगतः सृष्टि+आदि+हेतो! (हे) भक्त+पुं+अर्थ+कल्प+द्रुः जन+सेवि! 'मातः' इति उक्त+ संबोधन+सिद्धि+पूर्वं मे सु+प्रजस्त्वं आशु अर्पय।११। एवं अत्रिवत् याच्ञां श्रुत्वा प्राह, 'तथा एव ते मा+दृक् पुत्रः भविता। तत्+उक्तिं मा तिरस्कुरु'।१२। इति उक्त्वा दत्तः अन्तर्दधे। सा अपि हर्षिता वेश्मे एत्य तत् सर्वं पत्ये शशंस। उभौ अपि ननन्दतुः।१३।

त्या देवदुर्लभ दर्शनाने भारावून गेलेली ब्राह्मणी सद्गदित कंठाने बोलूं लागली. 'मी धन्य झाले! माझे सर्व पितर धन्य झाले!! योग्याच्या मनांपासूनही विशेषच दूर असणारे आपण आज माझ्या दृष्टीसमोर आलां. इतकेच नाही पितरांसाठी सिद्ध केलेले रुचकर अन्न ग्रहण केलेत! यापेक्षा अधिक सद्भाग्य ते काय?'१०. जगताची उत्पत्ती-स्थिती-संहार आपल्यापासूनच आहेत. भक्तांच्या पुरुषार्थासाठी आपण कल्पवृक्षाप्रमाणे आहांत. आपण 'आई' अशी जी हांक मारलीत तिला सत्यत्व येण्यासाठी (आपल्यासमान) सर्व लोकांना पूज्य अशा सुपुत्राचे मातृत्व मला शीघ्र द्या!११. अत्रिऋषींच्या मागण्यासारखीच ही तिची मागणी ऐकून दत्तप्रभू म्हणाले, 'तसेच होईल! तुला माझ्यासारखाच पुत्र होईल. मात्र त्याच्या वचनाचे तू कधीही उल्लंघन करूं नकोस!'१२. एवढे बोलून दत्तप्रभू अंतर्धान पावले. ती आनंदित झालेली सुमतीही घरांत आली आणि तिने यजमानांना सर्व हकीकत सांगितली. दोघेही हर्षनिर्भर झाले.१३.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**मयापराद्धमद्यान्नं दत्तं श्राद्धेऽकृतेप्यहो । दत्तात्रेयाय तन्नाथ क्षन्तुमर्हस्यशेषतः ॥१४॥**

॥ विप्र उवाच ॥

**पित्रर्थं भोजयित्वान्नैर्यैर्द्विजान्विष्णवेऽर्प्यते । कर्माभूत्स स्वयं तद्भुक्तत्कृतं सत्सुदुष्करम् ॥१५॥**
**रूपान्तरेण मध्याह्ने दत्तोऽटत्यर्थिवत्स्वकान् । उद्धर्तुं भगवांस्तस्मात्तदार्च्यो नान्यथाप्यते ॥१६॥**
**तस्माद्भद्रे कृतं भद्रं धन्ये नः पावितं कुलम् । वरोऽपि दुर्लभो लब्धो लोकस्यापि हितं यतः ॥१७॥**

ब्राह्मणि उवाच। 'अहो नाथ! अद्य श्राद्धे अकृते अपि दत्तात्रेयाय अन्नं दत्तम्। मया अपराद्धम्। तत् अशेषतः क्षन्तुं अर्हसि'।१४। विप्र उवाच। 'यैः अन्नैः पितृ+अर्थं द्विजान् भोजयित्वा (तत्) कर्म विष्णवे अर्प्यते, सः स्वयं तत्+भुक् अभूत्। सत्सु दुष्करं कृतम्।१५। दत्तः मध्याह्ने स्वकान् उद्धर्तुं रूपान्तरेण अर्थिवत् अटति। तस्मात् भगवान तदा अर्च्यः। अन्यथा (तथा) न आप्यते।१६। तस्मात् (हे) भद्रे, भद्रं कृतम्। नः कुलं पावितम्। वरः अपि दुर्लभः प्राप्तः। यतः लोकस्यापि हितम्'।१७।

सुमती म्हणाली, 'हे नाथ, श्राद्ध केलेले नसतांही श्राद्धीय अन्न दत्तात्रेयांना देऊन मी मोठाच अपराध केला आहे. आपण त्यासाठी क्षमा करावी!'१४. 'पितरांप्रीत्यर्थ केलेले जे चतुर्विध अन्न ब्राह्मणाना जेववून ते कर्म नंतर विष्णूलाच अर्पण करायचे असते. त्याच भगवान विष्णूंनी ते प्रत्यक्ष खाल्ले. हे अतिशय कठीण (किंवा मोठ्यांनाही कठीण) असे महान कर्म तू केलेले आहेस.१५. माध्याह्न काळी भगवान दत्तप्रभू याचकाच्या रूपाने भक्तांचा उद्धार करण्यासाठी फिरत असतात. त्या वेळी त्यांचे भिक्षा वाढून पूजन केले पाहिजे. अशा दुपारच्या वेळी केलेल्या अन्नदानाने त्यांची जशी कृपा प्राप्त होते तशी भजनपूजनादि अन्य साधनांनीही होत नाही. एवढ्यासाठी ही अन्नदानरूपी भगवत्सेवा अवश्यमेव करावी. माध्याह्नकाली आलेल्या अतिथीला अवश्य यथाशक्ती अन्न वाढावेच.१६. तेव्हां हे भाग्यवती, तूं हे पुण्याईचेच कार्य केले आहेस. आमचे कुल तू पावन केले आहेस. तसेच जो दुर्लभ वर तू मिळवला आहेस तो केवळ आपलेच नव्हे तर सर्व लोकांचेही हित करणारा आहे. तुझ्या निमित्ताने भगवान दत्तात्रेयांचाच अवतार भूतलावर होणार आहे!'१७.

**इत्युक्त्वा लौकिकं श्राद्धं शेषान्नेनाकरोद् द्विजः । साप्यथो गर्भिणी भूत्वा कालेऽसूतामुमप्यजम् ।।१८।।**
**मर्त्याकृतिं तदोद्वीक्ष्य तं दैवज्ञा जगुर्द्विज । ततपुण्यौघकल्पद्रु-फलं लब्धं सुदुर्लभम् ।।१९।।**
**अयं हि साक्षाद्भगवान्दत्तात्रेय इवार्चितः । अवतीर्णोऽत्र भक्त्यर्थमित्युक्त्वा ते मुदं ययुः ।।२०।।**

इति उक्त्वा द्विजः शेष+अन्नेन लौकिकं श्राद्धं अकरोत्। अथ सा अपि गर्भिणी भूत्वा काले, अजम् अपि अमुम्, असूत।१८। तदा मर्त्य+आकृतिं तं उद्वीक्ष्य दैवज्ञाः जगुः। (हे) द्विज, सुदुर्लभं ततः+पुण्य+ओघः+कल्प+द्रुः+फलं लब्धम्।१९। साक्षात् भगवान् दत्तात्रेय इव अर्चितः अयं (बालकः) हि अत्र (तव) भक्त्यर्थं अवतीर्णः (लक्ष्यते)। इति उक्त्वा ते मुदं ययुः।२०।

खरे तर श्राद्धासाठी केलेले अन्न साक्षात दत्तप्रभूंनाच समर्पण करून त्यांचीच प्रीती संपादन केल्यावर श्राद्ध सुसंपन्न झालेच होते. दत्तकृपेने ज्ञानी झालेल्या राजा आणि सुमती यांना हे कळतही होते. तरी पण ज्ञानी जसा आचरण करतो त्याचाच कित्ता इतर अज्ञानी लोक गिरवतात म्हणून गीतेच्या आदेशानुसार लोकसंग्रहासाठी त्या ब्राह्मणाने उरलेल्या अन्नाने ब्राह्मण जेववून श्राद्धाचा विधी पूर्ण केला. विष्णूला निवेदन केलेल्या अन्नाने अन्य देवतांची पूजा करूं नये असे स्मार्त मत असले तरी भागवत मताने आधी विष्णूला नैवेद्य दाखवून मगच अन्य देवतांना दाखवावे असाच विधी सांगितला आहे. पुढे त्या विप्रस्त्रीला गर्भ राहिला आणि यथाकाल दहाव्या महिन्यात जन्ममरणादि विकाररहित अशा ह्या वरद भगवंताला जन्म दिला.१८. मानवरूपधारी त्या प्रभूला पाहून - त्याचे जन्मकाळाचे ग्रहमान बघून, (आपळराजाने बोलावलेले) ज्योतिषी म्हणाले, ‘विप्रवरा, खरोखर, तुझ्या पूर्वपुण्याईच्या वाढलेल्या कल्पवृक्षाचे अत्यंत दुर्लभ असे हे फळ तुला मिळाले आहे!१९. हा बाळ साक्षात् भगवान् दत्तात्रेयांसारखा पूज्य तुझ्या घरी तुझ्या भक्तीमुळेच अवतरला आहे असे आम्हाला वाटते.’ असे बोलून बाळाच्या पत्रिकेतील शुभ आणि उच्चीचे ग्रह पाहून तेही आनंदित झाले.२०.

**श्रीपादः स्वङ्किताङ्घ्रित्वान्नाम्नोक्तः पितृलौल्यतः । स्वङ्गैरृद्धिं पुपोषारं सौरांश्वाप्तेः शशीव सः ।।२१।।**
**संस्कृतेनोपनीतेन स्वयं त्रय्यपि पाठिता । स्वोद्वाहार्थं समुद्युक्तः पितानेन निवारितः ।।२२।।**

सु+अङ्कित+अङ्घ्रि+त्वात् श्रीपादः इति नाम्ना उक्तः। पितृ+लौल्यतः अरं सु+अङ्गैः सौर+अंशु+आप्तेः शशि इव ऋद्धिं पुपोष।२१।
संस्कृतेन (तथा) उपनीतेन अनेन स्वयं त्रयी पाठिता अपि। स्व+उद्वाह+अर्थं समुद्युक्तः पिता अनेन निवारिता।२२।

वज्र, अंकुश, ध्वज, पद्म इत्यादि शुभ चिह्नांनी शोभणाऱ्या पायांवरून त्याचे नांव श्रीपाद असे ठेवण्यांत आले. **श्री** या शब्दाचे शोभा, संपत्ती आणि पद्म असे अर्थ होतात. मातापित्यांच्या संगोपनाने लवकरच श्रीपाद सूर्यकिरणांनी व्यापलेल्या चंद्रासारखा सर्वांगांनी वाढू लागला. भारतीय परंपरेनुसार चंद्रमंडल हे जलमय आहे. त्या आकाशस्थ चंद्रावर पडलेले सूर्याचे किरण परावर्तित झाल्याने रात्रीचा अंधार नाहीसा होतो. एखाद्या अंधाऱ्या घरांत आरशावर पडलेल्या सूर्याच्या किरणांनी ते घर उजळून निघावे तसेच हे आहे. शुक्ल पक्षांत सूर्य आणि चंद्र यांच्यातील अंतर कमी होत जाते आणि सूर्याचे किरण वाढत्या प्रमाणांत चंद्रमंडलाला व्यापतात. त्यामुळे चंद्रबिंब जसे वाढत जाते तसा मातापित्यांच्या संगोपनाने श्रीपाद वाढूं लागला असा भावार्थ.२१. श्रीपादाचे जातकर्मापासून सर्व शास्त्रविहित संस्कार आपळराजाने केले आणि मुंजही केली. मुंज झाल्यावर खरे तर वेद आणि शास्त्रांचे अध्ययन करावयाचे असते. पण अवतारी श्रीपादाला त्या सर्वांचे स्वयंभूच ज्ञान असल्याने ऋक्, यजुः आणि साम या वेदत्रयीचे तसेच आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त या कर्मत्रयीचे त्यानेच इतरांना शिक्षण द्यायला आरंभ केला. यथाकाल श्रीपाद विवाहाला योग्य झालेला पाहून त्याच्या लग्नाच्या दृष्टीने राजा ब्राह्मणाने प्रयत्न आरंभिले. ते पाहून श्रीपादांनी मात्र त्यांना विरोध केला.२२.

**।। श्रीपाद उवाच ।।**

**मया प्रव्रजतोद्वाह्या योगश्रीरेव नापरा । ममैव सुलभा सा तु यतः श्रीवल्लभोऽस्म्यहम् ।।२३।।**
**इत्युक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वोभौ साश्रुलोचनौ । ऊचतुस्त्वयि याते क्व जीवावोऽब्जा इवाम्बुनि ।।२४।।**

श्रीपाद उवाच। 'प्रव्रजतः मया योग+श्रीः एव उद्वाह्या, न अपरा। मम एव सा सुलभा, यतः श्री+वल्लभः अस्मि'।२३। इति उक्त्वा प्रव्रजन्तं तं दृष्ट्वा स+अश्रु+लोचनौ उभौ ऊचुः। 'त्वयि याते क्व जीवावः? अम्बुनि (याते) अब्जा (मत्स्याः) इव (मरिष्यावः)।२४।

**गृहस्थाश्रमाची आवश्यकता -** आपळराजांनी केलेले प्रयत्न हे श्रुती आणि स्मृतींच्या आज्ञाना अनुसरूनच होते. मनुस्मृतींत (३:२) ब्रह्मचर्याश्रमांत एक वा दोन वेदांचे अध्ययन करून गृहस्थाश्रम स्वीकारावा असे सांगितले आहे. तैत्तिरीय उपनिषदांतही (१:११:१) वेदाध्ययन झाल्यावर, 'आचार्यांना धनाने - गुरुदक्षिणेने प्रसन्न करून प्रजेचा तंतू तोडूं नकोस' म्हणजेच विवाह करून पुत्रलाभासठी प्रयत्न करण्याचाच उपदेश केला आहे. याचे कारण जन्माला येणारा प्रत्येक ब्राह्मण देव, ऋषी आणि पितर अशा तीन ऋणांसहच येतो (तैत्तिरीय संहिता ६:३:१०). स्वाध्याय (वेदाध्ययन) करून, अनुरूप स्त्रीशी विवाह करून आणि यज्ञयागादींचे अनुष्ठान करून, ऋतुकाली पत्नीशी समागम करून ऋणत्रयांपासून मुक्त व्हावे. क्वचित् पुत्रोत्पत्तीला कांही प्रतिबंध येत असेल तर पुत्रकामेष्टी करून त्या दिशेने प्रयत्न करण्याचीही शास्त्राची आज्ञा आहे. निपुत्रिकाला (स्वर्गादि) लोक मिळत नाहीत असेही सांगितले असतांना श्रीपादवल्लभांनी त्यांना प्रतिबंध कां केला या प्रश्नाचे उत्तर पुढील श्लोकांत देत आहेत.

**श्रीपादांची भूमिका -** अध्यात्मयोगाला साह्यभूत होणाऱ्या श्रेयरूपा - कल्याणकारी लक्ष्मीचा मला अंगीकार करायचा आहे म्हणून मी संन्यास घेतो आहे. कर्ममयी दुसरी जी प्रेयरूपा संपत् तिच्या अंगीकारानेही अंतःकरणशुद्धीद्वारा दैवी संपत् मिळेलच असे म्हटले तर त्यांत कर्माच्या बंधनात अडकण्याचा धोका आहे.

**त्वं साक्षाद्भगवान्विष्णुः पुत्रत्वेनाप्यतीन्द्रियः । प्राक्पुण्यैर्गोचरीभूतः कुतोऽकाब्धौ जहासि नौ ।।२५।।**

'त्वं साक्षात् भगवान् विष्णुः अति+इन्द्रियः अपि प्राक्+पुण्यैः पुत्रत्वेन गोचरीभूतः। नौ अक+अब्धौ कुतो जहासि?'।२५।

कठोपनिषदाच्या उपदेशानुसार (१:२:१) श्रेयाच्या अंगीकाराने कल्याण होते तर प्रेयाच्या अंगीकाराने अधोगती होते. किंवा असाही अर्थ करतां येईल कीं वेदांनी चित्तशुद्धीसाठी सांगितलेली ऋग्वेदादिरूपा अपरा श्री मला स्वीकारायची नाही कारण ते साधन मला आधीच प्राप्त झालेले आहे. त्यामुळे माझ्यासारख्या अधिकारसंपन्नालाच लाभणाऱ्या 'श्रेयोरूपा संपत्ती'चाच मी स्वीकार करणार आहे. त्यामुळेच माझे 'श्रियेचा वल्लभ' असे नांव आहे. ह्याचा भावार्थ असा आहे की कर्मकाण्डांतील विधी आणि निषेध प्रतिपादणाऱ्या श्रुती संसारांत आसक्त असणाऱ्या लोकांना उद्देशून सांगितल्या आहेत; आसक्तिरहित साधकांना नव्हेत. लैंगिक सुख, मांसाशन आणि मदिराप्राशन यांच्याकडे स्वाभाविक ओढ असणाऱ्यांना विशिष्ट प्रसंगी, विशिष्ट प्रकारेच त्यांचे सेवन करण्याची शास्त्राची केवळ अनुज्ञा आहे. याला परिसंख्या असे म्हणतात. यज्ञांतला हुतशेष म्हणूनच थोडे मांस किंवा सुरा घ्यायला किंवा स्वतःच्या पत्नीशीच, ऋतुकाळांतच समागम करण्याचे (आश्वलायन श्रौतसूत्र २:१६,२२-२७) विधान आहे. पराशर स्मृतीत (४:१३) ऋतुकाळांत पत्नीजवळ न जाण्याने भ्रूणहत्येचा दोष लागतो असे सांगितले आहे. हा दोष नावडती म्हणून किंवा द्वेषामुळे भार्येची उपेक्षा करणाऱ्यांसाठी आहे, विरक्ताला नाही हे ध्यानांत घेतले पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) ह्याच परमात्म्याचे ज्ञान प्राप्त करण्याच्या इच्छेने पूर्वीच्या ऋषिमुनींनी संन्यास घेतला. संततीची इच्छा सोडली. ते म्हणतात, संतती घेऊन आम्हाला काय करायचे आहे? त्यांच्यापासून न आम्हांला हा आत्मा प्राप्त होईल न हा लोक! पुत्रैषणा, वित्तैषणा आणि लोकैषणा ह्यांचा त्याग करून ते भिक्षेकरी झाले.२३. असे बोलून घर सोडून निघालेल्या त्या श्रीपादवल्लभाला पाहून त्याच्या आईवडिलांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. ते म्हणाले, 'तू आम्हांला सोडून गेल्यावर आम्ही कसे जगूं? पाण्याविना मासोळ्यांसारखे आम्ही मरून जाऊं.' (२४) आपण साक्षात् भगवान विष्णु आहांत. अतीन्द्रिय असूनही आमच्या पूर्वपुण्याईमुळे पुत्र या नात्याने आम्हांला दर्शन दिलेत. आतां आम्हांला असे शोकसागरांत टाकून कसे जातां?'२५.

**पङ्ग्वन्धार्भेक्षणान्नित्यं भवपाशविमोचनी । स्मृतिः प्रवयसोर्नौ ते हरे दूरतरा भवेत् ।।२६।।**
**इति वाक्यं सकारुण्यं श्रुत्वारं भ्रातृमस्तके । सुखाकरं निजकरं तद्वात्सल्याद्दधौ हरिः ।।२७।।**
**तदैव सहसा तौ तु स्वङ्गौ ज्ञौ च बभूवतुः । लीलाविहारिणीदन्नो चित्रं भगवतीश्वरे ।।२८।।**

(हे) हरे, नित्यं पङ्गु+अन्ध+अर्भ+ईक्षणात् प्रवयसोः नौ ते भवपाशविमोचनी स्मृतिः दूरतरा भवेत्।२६। इति सकारुण्यं वाक्यं श्रुत्वा तत्+वात्सल्यात् हरिः सुख+आकरं निजकरं अरं भ्रातृमस्तके दधौ।२७। तदा एव तौ सहसा सु+अङ्गौ ज्ञौ च बभूवतुः। लीलाविहारिणि भगवति ईश्वरे इदं न चित्रम्।२८।

'दुःख, दैन्य, पाप, ताप यांचे हरण करणाऱ्या हरी, (तूं गेल्यावर) सतत एक आंधळा आणि एक पांगळा अशा ह्या मुलांकडे पहाणाऱ्या आम्हांला वृद्धापकाळी मृत्युरूप संसारपाशांतून सोडवणारी तुझी स्मृतीसुद्धां आम्हांला दुरावेल.' वार्धक्य आणि मृत्यू ह्या दोन्ही कठीण प्रसंगी आम्ही तुझ्यावांचून निराधार होऊं असा भावार्थ.२६. यापुढील श्लोक सिद्धमुनी सांगत आहेत.

असे त्यांचे दीनवाणे वचन ऐकून त्यांच्यावरील प्रेमाने दुःखहारक श्रीपादांनी सुखाची जणूं खाणच असा आपला आनंदप्रेषक हात लगेच आपल्या बंधूंच्या मस्तकावर ठेवला.२७. श्रीपादांच्या हाताचा स्पर्श होतांच तत्काळ त्या दोघां भावांचे अपंगत्व एकदम नाहीसे झाले. आंधळ्याला उत्तम दृष्टी आली आणि पांगळ्याला छान चालतां येऊं लागले. एवढेच नाही तर ते ज्ञानसंपन्न झाले. लीलेने मनुष्यदेह धारण केलेल्या सर्वसमर्थ ईश्वराच्या संबंधांत ह्यांत कांहीच आश्चर्य (**चित्रं**) नाही.२८.

**माताप्यदृष्टपूर्वं तद्रूपमाश्चर्यवत्तदा । दृष्ट्वा दत्तोदितं स्मृत्वा प्राह गद्गदया गिरा ।।२९।।**
**माया दुरत्यया दैवी तव तन्मोहिता भृशम् । सत्वं रूपं न जानेऽतस्त्वयि मे पुत्रकल्पना ।।३०।।**

तदा माता अपि अदृष्टपूर्वं तत् रूपं आश्चर्यवत् दृष्ट्वा दत्त+उदितं स्मृत्वा (च) गद्गदया गिरा प्राह।२९। 'तव दैवी माया दुरत्यया। भृशं तत्+मोहिता (अहं तव) सत्त्वं रूपं न जाने। अतः त्वयि मे पुत्रकल्पना'।३०।

**आत्मदर्शन -** अशा रीतीने आपल्या वडील भावांना स्वस्थ केल्यावर श्रीपादांनी आपल्या आईला आपल्या स्वरूपाचे दर्शन दिले. ते पूर्वी न पाहिलेले स्वरूप पाहून ती स्तिमित झाली. खरे तर परमेश्वराची दोन स्वरूपे नाहीतच. पण हे सच्चिदानंदस्वरूप पूर्वी विक्षेप आणि आवरण ह्या मायेच्या दोन शक्तींच्या प्रभावाने, राहूने झांकलेल्या सूर्यासारखे, दिसले नव्हते - अनुभवाला आले नव्हते. ह्यांतून श्रीपादांनी आपल्या मातेला अपरोक्ष आत्मानुभूती दिली असे सूचित होते. गीतेत (२:२९) 'आश्चर्यवत् पश्यति' असेच आत्मदर्शनाचे वर्णन आहे. भ.पू. शंकराचार्यांनी हे आत्मदर्शन अदृष्टपूर्व असल्याने आश्चर्याला कारण होते असे टीकेत म्हटले आहे. त्याचाच इथे श्रीस्वामिमहाराजांनी अनुवाद केला आहे. कठोपनिषदातंही 'आश्चर्यो वक्ता' असे म्हटले आहे. सुमतीला आधी श्रीदत्तप्रभूंचे सगुण दर्शन झाले होते. हे त्यापेक्षां वेगळे निर्गुणसाक्षात्कारात्मक दर्शन झाले. ह्या अनुभवानंतर तिला त्या पूर्वीच्या दर्शनाच्या वेळी दत्तप्रभूंचे. 'तुला होणाऱ्या मुलाचे वचन मोडूं नकोस,' हे सांगणे आठवले आणि ती सद्गदित कंठाने म्हणाली.२९. 'तुझी अलौकिक अद्भुत माया खरीही म्हणतां येत नाही आणि खोटीही म्हणतां येत नाही ('सदसद्विलक्षण') अशी असल्याने दुस्तर आहे. त्यामुळे मी पार मोहून गेले! ('मुह्' या धातूचा अर्थ मनांत अवास्तव कल्पना उगवणे.) त्यामुळे तुझे वास्तव स्वरूप मला जाणतां आले नाही; आणि तू माझा मुलगा आहेस अशी विपरीत कल्पना माझ्या मनांत घर करून राहिली.'३०.

**ब्रह्माण्डलेखा यत्कुक्षौ स मत्कुक्षिज इत्यदः । जगद्विडम्बनं दत्त माया मां नावृणोतु ते ।।३१।।**

**।। श्रीपाद उवाच ।।**

**अदो रूपं त्वया दृष्टं नित्यं हृद्यवधारय । मायासिन्धुं द्रुतं तीर्त्वा मत्सायुज्यं गमिष्यसि ।।३२।।**
**शतायुषौ सुतौ तेऽपि पितृशुश्रूषणोत्सुकौ । विद्याश्रीपुत्रपौत्राढ्यौ मातर्मंक्षु भविष्यतः ।।३३।।**

यत् कुक्षौ ब्रह्मांडलेखा स मत्+कुक्षिजः इति अदः जगत् विडंबनं। (हे) दत्त! ते माया मां न आवृणोतु।३१। श्रीपाद उवाच। अदः त्वया दृष्टं रूपं नित्यं हृदि अवधारय। मायासिंधुं द्रुतं तीर्त्वा मत्+सायुज्यं गमिष्यसि।३२। (हे) मातः ते सुता अपि शतायुषौ, पितृशुश्रूषणोत्सुकौ, विद्या+श्री+पुत्र+पौत्र+आढ्यौ मंक्षु भविष्यतः।३३।

'ज्याच्या उदरांत अगणित ब्रह्मांडांच्या पंक्ती सहज सामावल्या आहेत तो माझ्या पोटीं जन्मला हे जगाला दाखवण्याचे केवळ नाटक आहे. हे दत्तप्रभो, तुझी माया माझ्या(बुद्धी)वर आवरण न टाको.'

**मायेची आवरणशक्ती -** मायेच्या दोन शक्ती आहेत. आवरणशक्ती आपल्या (आत्म)स्वरूपाला झांकून ठेवते, आणि विक्षेपशक्ती नसलेला, मिथ्या प्रपंच दाखविते. जन्ममरणादिरूप ह्या संसाराचे कारण मुख्यत्वे **असत्त्वावरण** आणि **अभानावरण** हेच आहेत असत्त्वावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्वच नाही अशी भावना. ही अध्यात्मशास्त्राच्या श्रवणमननाने दूर होते. अभानावरण म्हणजे परमात्म्याचे अस्तित्व मनापासून पटले तरी तसा प्रत्यक्ष अनुभव न येणे. निदिध्यासनाने (ध्यानाने) हे जाऊन आत्मसाक्षात्कार होतो. विक्षेप म्हणजे देहादिकांच्या अध्यासाने खऱ्या वाटणाऱ्या जगतासंबंधीच्या कल्पना आणि विकार. हा विक्षेप संसाराचे कारण नाही. अंधुक प्रकाशांत दोरीवर भासणारा साप हे अज्ञान आहे. त्यांत दोरी न दिसणे हे अभानावरण आहे. ती दोरी तिथे नाहीच असे वाटणे हे असत्त्वावरण आहे.

**स्तुतोऽपि भ्रातरौ प्राह प्रव्रजाम्यधुना सदा । संसेव्यौ पितरौ तौ हि गृहिसत्पुत्रदैवतम् ।।३४।।**

**इत्युक्त्वा त्रिः परिक्रम्य प्रणम्य पितरौ स तु । जगाम तदनुज्ञातः काशीं च बदरीवनम् ।।३५।।**
**साधूनुद्धर्तुकामोऽथ गोकर्णं सज्जनाश्रयम् । ययौ यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम् ।।३६।।**

स्तुतःभ्रातरौ अपि प्राह, 'अधुना अहं प्रव्रजामि, पितरौ सदा संसेव्यौ। तौ हि गृहि+सत्+पुत्र+दैवतम्।'।३४। इति सः तु उक्त्वा पितरौ त्रिः परिक्रम्य तत्+अनुज्ञातः काशीं च बदरीवनं जगाम।३५। साधून् उद्धर्तु+कामः सत्+जन+आश्रयं गोकर्णं ययौ, यत्र गणेशेन शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्।३६।

## ।।इति श्रीगुरुचरिते श्रीपादावतारो नाम पञ्चमोध्यायः।।५।।

ह्या दोन्ही आवरणांमुळेच तिथे नसलेला साप दिसूं लागतो. तो पाहून निर्माण झालेले भय, शरीराला सुटलेला कांप इत्यादि विक्षेप होत. दिव्याच्या प्रकाशाने दोरी दिसणे हे ज्ञान होय. दोरी पाहिल्यावरसुध्दां छातीतली धडधड, शरीराचा कंप इत्यादि विक्षेप थोडा काळ राहतात. ते तसे राहिले तरी दोरीचे झालेले ज्ञान जात नाही आणि सापाचा भासही पुन्हा होत नाही. ते विक्षेप जावेत म्हणून वेगळे उपाय करण्याची आवश्यकता नाही. ते आपोआपच शमतात. ह्या अभिप्रायानेच सुमती फक्त मायेच्या आवरणापासूनच दूर ठेवण्याची प्रार्थना करीत आहे. श्रीस्वामिमहाराजांच्या 'सत्यज्ञानानंत' या अभंगांत हा अभिप्राय फार छान मांडलेला आहे. तो इथे उद्धृत करीत आहे.

**सत्यज्ञानानंत तुज वदे वेदांत । हें शोधितों होउनी दांत शांत समाहित ।।१।।**

**मालासर्पभ्रांत ध्वांती दीपें शांत । होय तेवीं हा वेदांत शमवी जीवभ्रांत ।।२।।**

**साप नोहे माळा स्पष्ट दिसली डोळां । घातली कंपे मिठी गळां न सुटे कांही वेळां ।।३।।**

**आवरणाची स्थिती न वसे विज्ञानांती । विक्षेपाची स्वरूपशांती होय प्रारब्धांतीं ।।४।।**

**जीव त्वन्मय होतां आवरणाची न वार्ता । स्वाधिष्ठानी तत्त्वें मिळतां विक्षेपान्त दत्ता ।।५।।**

**ऐसा वेदांतार्थ जाणुनी शोधूं स्वार्थ । मग तूं दत्ता भेटसी आम्हां इतर श्रम हा व्यर्थ ।।६।।**३१.

हे तूं पाहिलेले रूप सतत हृदयांत धारण कर म्हणजे तू हा मायासागर लवकरच पार करून माझे सायुज्य प्राप्त करशील. ह्या तुला अनुभवाला आलेल्या आत्मस्वरूपाचे तूं नित्य मनन आणि निदिध्यासन करून तें सत्त्वप्रधान हृदयांत स्थिर कर असा आदेश श्रीपादांनी दिला आहे. **दृष्टं** म्हणजे वृत्तिव्याप्तीने अनुभवलेले आत्मस्वरूप. वृत्तीव्याप्ती आणि फलव्याप्ती अशा दोन प्रकारांच्या ज्ञानांचा विचार आपण चौथ्या अध्यायांत (४:५५) केला आहे. आत्मानुभूती झाली तरी ती चित्तांत स्थिर होण्यासाठी अभ्यासाची आणि काळाची आवश्यकता आहे. एकदां केलेल्या उपदेशाने ज्ञान स्थिर झाले नाही तर त्याची उजळणी करावी ह्या ब्रह्मसूत्राचा (४:१:१) दाखला इथे श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. अशा रीतीने ज्ञानाचे प्रतिबंध (असंभावना, संशयभावना आणि विपरीतभावना) दूर होऊन माझ्या सच्चिदानंद स्वरूपाशी तूं एकरूप होशील.३२. तसेच हे माते, तुझे हे दोन्ही पुत्र शतायुषी होतील, आई-वडिलांची (तुमची) सेवा करण्यांत तत्पर असतील आणि विद्या, संपत्ती, पुत्र, पौत्र इत्यादीनी समृद्ध होतील.३३.

**दैवतें मायबाप -** श्रीपादांनी मातेला उपदेश केल्यावर त्यांच्या ज्येष्ठ बंधूंनीही त्यांचे स्तवन केले. त्यांना श्रीपाद म्हणाले, 'आज मी घर सोडून संन्यस्त जीवनाचा अंगीकार करीत आहे. तुम्ही दोघांनी यापुढे आईवडिलांची निरलस सेवा करावी. कारण गृहस्थाश्रमांत गुणी सुपूताची मुख्य दैवते मातापिताच आहेत. तशी वेदांची 'मातृदेवो भव. पितृदेवो भव' आज्ञाच आहे.' यांत मुख्यतः गृहस्थाश्रमाचाच उल्लेख एवढ्यासाठी आहे की ब्रह्मचारी गुरूंच्या अधीन असतो आणि संन्याशाने सर्व ममत्वाचा त्याग केलेला असतो.३४. वर **'पितरौ'** या शब्दाने आई आणि वडील असा दोघांचाही बोध होतो. आईवडिलांना तीन वेळां सव्य प्रदक्षिणा करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन श्रीपाद काशी आणि बदरिकाश्रमाला जायला निघाले.३५. काशी आणि बदरी यांची यात्रा करून श्रीपाद साधूंच्या उद्धाराच्या इच्छेने, सज्जनांना आश्रयभूत

अशा गोकर्णाला गेले, जिथे साक्षात् गणेशाने शैव लिंगाची स्थापना केली आहे.३६.

**समारोप -** श्राद्धाचा स्वयंपाक श्राद्धाच्या पूर्वीच इतरांना देणे हे तसे विकर्मच मानावे लागेल. पण भुकेला अतिथी घरी आलेला असेल तर त्याला अन्न नाही दिले तरीही ते विकर्मच होईल. *'स इद्भोजो यः'* इत्यादि मंत्रातून (ऋग्वेद १०:११७:३-४) अन्नदानाचे महत्त्व वर्णन केले आहे. अशा दुविधेत सांपडलेल्या सुमतीने दान न देण्यापेक्षां दान देणे बरें अशा भावात्मक निर्णय घेतला आणि *'अतिथिः सर्वरक्षकः'* या वचनाला अनुसरून हा अतिथी विष्णुस्वरूप आहे अशा ईश्वरबुद्धीने अतिथीला अन्न दिल्याने त्या सत्त्वगुणसंपन्न ब्राह्मणीला श्राद्धाच्या अनंतपट फळ लाभले. यावरून असे दिसते की सत्कर्माला प्रवृत्त होणारा बंधातून मुक्त होतो. अन्यथा कर्माची गती गहन आहे हेच खरे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा पांचवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अथ षष्ठोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**शैवं तत्र गणेशेन कुतो लिङ्गं प्रतिष्ठितम् । सज्जनाश्रयमेतत्तु कथं श्रावय मे मुने ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**विष्णवाज्ञया गणेशेन रावणात्तं प्रतिष्ठितम् । शैवं लिङ्गं ततोऽत्रासन्देवाः संतोऽप्यदः शृणु ।।२।।**

नामधारक उवाच। तत्र गणेशेन शैवं लिङ्गं कुतः प्रतिष्ठितम्? एतत् तु सत्+जन+आश्रयं कथम्? (हे) मुने, मे श्रावय।१। सिद्ध उवाच। गणेशेन विष्णु+आज्ञया रावण+आत्तं शैवं लिङ्गं प्रतिष्ठितम्। ततः देवाः संताः अपि अत्र आसन्।२।

**रावणाला फसवून गणेशें केले लिंग स्थापन ।**
**सहाव्यांत चांडालीचा उद्धार आणि गोकर्णवर्णन ।।१।।**

कर्माचे तत्त्व जाणणाऱ्या सात्त्विक भक्तावर ईश्वराचा प्रसाद होतो हे पांचव्या अध्यायांत दाखविल्यावर कर्मतत्त्व न जाणणाऱ्या असात्त्विक (आसुरी) भक्तावर देवाची कृपा झाली तरीही ती विघ्नांच्या द्वारा कशी निष्फळ होते ते ह्या अध्यायांत सांगितले आहे.

मागील अध्यायाच्या शेवटी आपण त्या गोकर्ण क्षेत्रांत गणेशाने शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली असे म्हणालांत ते कसे काय? तसेच हे गोकर्ण साधु जनांचा आश्रय आहे ते कोणत्या प्रकारे?१. सिद्धांनी उत्तर दिले - भगवान विष्णूंच्या आज्ञेने रावणाकडून घेतलेल्या भगवान शंकरांच्या आत्मलिंगाची गणपतीने ह्या क्षेत्रांत प्रतिष्ठापना केली. तेव्हांपासून ब्रह्मदेवादि देव तसेच साधूसंत इथे राहू लागले.२.

**भजन्तीं मृन्मयं लिङ्गं कैलासाप्त्यै तु रावणः । प्रसूं निषिध्य सेशाद्रिं श्रीमानाहर्तुमाययौ ।।३।।**
**हठात्कैलासमुद्धर्तुमुत्कमोजस्विनं शिवः । लोकोत्पातभिया गौर्या स्तुतोऽगाधोऽवरोधयत् ।।४।।**
**सोऽपि मृत्यून्मुखीभूतो ध्यानतुष्टेन शम्भुना । समुद्धृतो दशमुखस्तत्तुष्ट्यै साध्वगायत ।।५।।**

कैलास+आप्त्यै मृत्+मयं लिङ्गं भजन्तीं प्रसूं निषिध्य श्रीमान् स+ईश+अद्रिं आहर्तुं आययौ।३। हठात् कैलासं उद्धर्तुं उत्कं ओजस्विनं लोक+अत्पात+भिया गौर्या शिवः स्तुतः अग+अधः अवरोधयत्।४। सः अपि मृत्यु+उन्मुखी+भूतः ध्यान+तुष्टेन शम्भुना समुद्धृतः। दश+मुखः तत्+तुष्ट्यै साधु अगायत्।५।

एकदा रावणाची आई मृत्तिकेचे लिंग करून त्याची शंकराप्रमाणे पूजा करत असलेली रावणाला दिसली. आपल्यासारखा ऐश्वर्यसंपन्न मुलगा असतांना आईने यःकश्चित् मातीच्या लिंगाची पूजा करावी हे त्याला सहन झाले नाही. तिला तसे न करण्याला सांगून तिच्यासाठी साक्षात् कैलास पर्वतच भगवान शंकरासह आणण्याच्या उद्देशाने तो तिथे गेला.३. कैलासाजवळ पोंचतांच महाबली रावणाने आपल्या आसुरी वृत्तीला अनुसरून अख्खा पर्वतच पायापासून उचलायला आरंभ केला. त्यामुळे कैलासावर भूकंपासारखे उत्पात होऊं लागले. तेथील सर्व लोक घाबरून शंकरांकडे आले. तेव्हां पार्वतीने ध्यानमग्न शंकरांची स्तुती केली आणि कैलासावर आलेले हे संकट निवारण्याची प्रार्थना केली. तेव्हां शंकरांनी तो पर्वत डाव्या हातानेंच दाबून धरला. त्या वेळी रावण त्याच्या खाली सांपडला.४. शंकरांनी डाव्या हाताने सहज दाबल्यानेसुद्धां तो दहा तोंडांचा रावण मरणोन्मुख झाला आणि ध्यान करून शंकरांकडे दयेची याचना करूं लागला. तेव्हां प्रसन्न झालेल्या सदाशिवांनी त्याला कैलासाखालून सुखरूप बाहेर काढले. मग तो रावण शंकरांना प्रसन्न करण्यासाठी सुमधुर गाऊं लागला.५.

**सुस्वरं साङ्गरागाढ्यं माधुर्यं स्वर्णमुत्तमम् । कालोचितं जगौ गीतं ततानद्धघनारयुक् ।।६।।**
**प्राणिमात्रमनोहारि दिव्यं गानं स शंकरः । प्रीतोऽब्रवीत्साधु गीतं रावणेष्टं वरं वृणु ।।७।।**

**।। रावण उवाच ।।**

**पूर्मेऽन्यदुर्लभा हैमी श्रीर्दासी दैवविद्विधिः । मृत्युर्दासोऽनुगा देवास्तन्मे न क्वापि दुर्लभम् ।।८।।**

सु+स्वरं स+अङ्ग+राग+आढ्यं माधुर्यं स्वर्णं उत्तमं काल+उचितं तत+आनद्ध+घन+आर+युक् गीतं जगौ।६। सः शंकरः प्रीतः अब्रवीत्। (हे) रावण प्राणि+मात्र+मनः+हारि दिव्यं गानं साधु गीतम्। इष्टं वरं वृणु।७। रावण उवाच। मे हैमी पूः अन्य+दुर्लभा, श्रीः मे दासी, विधिः दैव+वित्, मृत्युः दासः, देवाः अनुगाः। तत् मे क्व अपि दुर्लभं न।८।

बळाच्या जोरावर कैलास मिळणे शक्य नाही हे कळतांच रावणाने भगवान शंकरांची गानप्रियता लक्षांत घेऊन आपल्या संगीताने त्यांना प्रसन्न करण्याचा उद्यम आरंभिला. सप्तस्वरांच्या सुरेल रचनेने विविध रागरागिणींनी युक्त गोड गायन तो करूं लागला. तो उत्तम कवी असल्याने त्याने यमक-अनुप्रासादि शब्दालंकारांनी आणि अर्थालंकारांनी युक्त अशी गीते रचून तो गाऊं लागला. आपली दहा मुखे आणि वीस हात यांचा उपयोग करून त्याने वीणादि तंतुवाद्ये (‘तत’), पखवाजादी चर्मवाद्ये (‘आनद्ध’), झांजा, टाळ इत्यादि घन वाद्ये आणि बांसरी, सनई इत्यादि फुंकून वाजवायची (‘आर’) वाद्ये अशी चारही प्रकारची वाद्ये साथीला घेतली. आपल्या आंतडीचे तंतुवाद्य करून त्याने वाजविले असा इतरत्र उल्लेख आहे.६. मानव आणि देवच नव्हे तर सर्वच प्राण्यांच्या मनाला लुभवणारे ते गायन ऐकून ते आशुतोष शंकर भगवान प्रसन्न होऊऩ त्याला प्रेमाने म्हणाले, रावणा! हे तुझे अलौकिक गायन उत्तम झाले. तुला हवा तो वर मागून घे.७. रावण शंकरांना वर मागतांना आधी प्रौढी करतो आहे. ‘माझी सोन्याची लंका शत्रूला अभेद्य आहे, साक्षात् लक्ष्मी माझी दासी आहे, ब्रह्मदेव माझा ज्योतिषी आहे, मृत्यू माझ्या आज्ञेवांचून कुणाचे प्राण घेऊं शकत नाही, सगळे देव माझे अनुचर आहेत. तेव्हां मला दुर्लभ असे या त्रैलोक्यांत काय आहे?’८.

**मात्राज्ञप्तोऽस्मि कैलासमानेतुं भो त्वयान्वितम् । देहि मे वरणीयार्थं भगवन्वरदोऽसि चेत् ।।९।।**

**।। शिव उवाच ।।**

**कैलासेन तु किं साध्यं प्राणलिङ्गं ततोऽधिकम् । गृहाणानेन मादृक्त्वं पूस्ते कैलासवद्भवेत् ।।१०।।**
**स्थाप्यते यत्र तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति । तस्मात्स्थापय पुर्येव धृत्वेदं कर्म मा कुरु ।।११।।**
**इत्युक्त्वा तत्करे लिङ्गं भक्त्याकृष्टमना ददौ । रावणोऽप्यतिसन्तुष्टो ययौ लङ्कां खलाग्रणीः ।।१२।।**

भो! मात्रा त्वया अन्वितं कैलासं आनेतुं आज्ञप्तः अस्मि। भगवन् वरदः असि चेत् वरणीय+अर्थं मे देहि।९। शिव उवाच। कैलासेन तु किं साध्यम्? ततः अधिकं प्राण+लिङ्गं गृहाण। अनेन त्वं मादृक्, ते पूः कैलासवत् भवेत्।१०। इदं यत्र स्थाप्यते तत्रैव सुस्थिरं प्रतितिष्ठति। तस्मात् पुरि एव स्थापय। इदं धृत्वा कर्म मा कुरु।११। भक्त्या+आकृष्ट+मना (शिवः) इति उक्त्वा तत्+करे लिंगं ददौ। खलाग्रणीः रावणः अपि अतिसंतुष्टः लङ्कां ययौ।१२।

आपल्याला स्वतःसाठी कांहीच मागायचे नाही अशी प्रस्तावना करीत रावण आपल्या आईचे नांव पुढे करीत आहे. मला मातेने आपल्यासहित कैलास आणण्याची आज्ञा केली आहे. आपल्याला वर द्यायचाच असला तर हाच वर (आपल्यासहित कैलास) द्या.९. तेव्हां भगवान शंकर त्याला म्हणाले, कैलास घेऊन काय मिळणार? त्यापेक्षां हे माझे प्राणलिंगच घे! त्याच्यामुळे तूं माझ्यासारखा होशील आणि तुझी लंकानगरीच कैलास होईल.१०. हे माझे आत्मलिंग तूं ज्या ठिकाणी ठेवशील तिथेच कायम स्थिर होईल. यासाठी तू ते आपल्या नगरीत पोचल्यावरच खाली ठेव. तसेच हे हातांत धरून कोणतेही कर्म करूं नकोस.११. भक्तीला भुललेल्या शंकरांनी असे बोलून ते आपले प्राणलिंग त्या रावणाच्या हातांत ठेवले. रावण म्हणजे लोकांना आक्रोश करायला लावणारा ('लोकान् रावयति') म्हणून त्याला दुष्टशिरोमणी म्हटले आहे. ते लिंग हातांत पडतांच त्याचा हर्ष गगनांत मावेना. त्याने तडक लंकेची वाट घरली.१२.

**ज्ञात्वैतन्नारदो योगी शशंस ब्रह्मणेऽपि सः । विष्णवे द्राक् त्रयोऽपीशं गत्वोचुः किं कृतं त्विदम् ।।१३।।**
**बद्धाः सर्वेऽमरा येन प्रसिद्धो लोककंटकः । राक्षसः प्राणिमात्राशी त्वत्समः स कथं कृतः ।।१४।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्याकृष्टं मनो मेऽद्य तेन गानादिना ततः । दत्तं लिङ्गं मया हर्षात्स नाद्यापि पुरं गतः ।।१५।।**
**व्याजेनैव खलो जय्य इत्युक्त्वा प्रेरयन्मुनिम् । विघ्नेशं च तदा विष्णुर्लिङ्गाहरण हेतवे ।।१६।।**

योगी नारदः एतत् ज्ञात्वा ब्रह्मणे शशंस। सः अपि विष्णवे (शशंस)। त्रयः अपि ईशं गत्वा ऊचुः इदं तु किं कृतम्?१३। येन सर्वे अमराः बद्धाः सः प्रसिद्धः लोककंटकः प्रणिमात्र+आशी राक्षसः त्वत्+समः कथं कृतः?१४। शिव उवाच। तेन गानादिना भक्त्या मे मनो अद्य आकृष्टम्। ततः मया हर्षात् लिंगं दत्तम्। (किंतु) सः अद्यापि पुरं न गतः।१५। तदा विष्णुः खलः व्याजेनैव जय्यः इति उक्त्वा मुनिं विघ्नेशं च लिंग+आहरण+हेतवे प्रेरयत्।१६।

योगाच्या परिपक्वतेने त्रिकालज्ञानी नारदांनी हे जाणले आणि मनोगतीने ही सर्व लिंगदानाची हकीकत जाणली. मनोवेगाने ब्रह्मलोकाला जाऊन आपल्या पिताजींच्या कानी घातली. ब्रह्मदेवसुद्धां नारदांना घेऊन तांतडीने वैकुंठाला गेले आणि त्यांनी विष्णूंना सर्व प्रकार कथन केला. मग ते तिघेही केवळ संकल्पानेच कैलास पर्वतावर शंकरांसमोर उपस्थित झाले आणि म्हणाले, रावणासारख्या दुष्टाला आत्मलिंगाचे दान आपण कसे बरे केले?१३. ज्याने सर्व देवांना बंदीखान्यांत टाकले आहे, जो तिन्ही लोकांना उपद्रव देणारा कांटा आहे असा सर्व प्राण्यांची संपत्ती आणि देहसुद्धां खातो असा राक्षस तुम्ही आपल्यासारखा कसा केला?१४. शंकर म्हणाले, ‘त्याने गायनादि भक्तीने माझ्या मनाला भुरळ घातली. त्या आनंदांत मी त्याला आत्मलिंग दिले खरे! पण अजून तो लंकेला पोंचला नाही.’ यांतून शंकर असे सुचवीत आहेत की तो लंकेला पोंचण्यापूर्वी माझ्या वरदानाला बाध न आणतां कांही उपाय तुम्ही करूं शकतां.१५. त्या वेळी विष्णूंनी विचार केला कीं ह्या दुष्टाला जिंकण्यासाठी साम-दाम-दंडादींचा उपयोग नाही. त्याला कपटानेच जिंकतां येईल. असे म्हणून त्यांनी नारदमुनीना रावणाला उशीर करायला, आणि विघ्नराज गणपतीला विघ्न करायला आणि रावणाकडून लिंग काढून घेण्यासाठी पाठविले.१६.

**नारदस्त्वञ्जसा योगी गत्वाग्रे रक्षसोऽब्रवीत् । आयातोऽसि कुतो ब्रूहि रावण द्राक् क्व गच्छसि ।।१७।।**
**रावणस्त्वब्रवीद् ब्रह्मन् तोषयित्वाद्य शंकरम् । लब्ध्वा लिङ्गं पुरं यास्ये पश्येदं शैवमुत्तमम् ।।१८।।**
**तत्प्रेक्ष्योचे मुनी रक्षः शृण्वेकः सैरभाशनः । मृगयायां हतो ब्रह्महरीशैर्दुर्धरो मृगः ।।१९।।**
**तैस्त्रीण्याप्तानि लिङ्गानि तच्छृङ्गेभ्यस्तदात्मवत् । मतान्यैशं त्विदं दैवाल्लब्धं सायुज्यदं विभोः ।।२०।।**
**सोऽप्याह नाद्य श्रोतव्यं गन्तव्यं सत्वरं मुने । क्वातीत्य संध्यां यासीति मुनिनोक्त उपाविशत् ।।२१।।**

योगी नारदः तु अञ्जसा रक्षसः अग्रे गत्वा अब्रवीत्। (हे) रावण कुतः आयातः असि? तथा द्राक् क्व गच्छसि? (मे) ब्रूहि।१७। रावणः तु अब्रवीत्। (हे) ब्रह्मन्! अद्य शंकरं तोषयित्वा लिंगं लब्ध्वा पुरं यास्ये। इदं उत्तमं शैवं (लिंगं) पश्य।१८। तत् (लिंगं) प्रेक्ष्य मुनी ऊचे। (हे) रक्षः शृणु। ब्रह्म+हरि+ईशैः मृगयायां एकः सैरभ+अशनः दुर्धरः मृगः हतः।१९। तैः तत्+शंगेभ्यः त्रीणि लिङ्गानि आप्तानि। (तानि तैः) आत्मवत् मतानि। इदं तु ऐशं विभोः सायुज्यदं दैवात् लब्धम्।२०। सः अपि आह, 'मुने न अद्य श्रोतव्यं, सत्वरं गन्तव्यम्।' ' संध्यां अतीत्य क्व यासि?' इति मुनिना उक्तः (सः) उपाविशत्।२१।

प्रथम नारदमुनी योगगतीने तात्काळ त्या राक्षसापुढे गेले आणि त्याला म्हणाले, 'अरे रावणा! तूं कुठून येतोयस? आणि एवढ्या घाईने कुठे चाललास? मला जरा सांग!'१७. रावण उत्तरला, 'मुनिवर्य! आज मी भगवान शंकरांना प्रसन्न करून त्यांचे आत्मलिंग मिळविले आहे. ते घेऊन मी माझ्या नगरीला जातो आहे. हे अत्युत्कृष्ट शैव लिंग पहा.'१८. ते लिंग पाहून नारदमुनी त्याला म्हणाले, 'हे राक्षसराजा, ह्याचा इतिहास ऐक. ब्रह्मा, विष्णू आणि शंकर ह्या तिघांनी शिकारीत एक रानरेड्यांचा आहार करणाऱ्या एक दुर्धर हिंस्र पशूची शिकार केली.१९. त्यानी त्या पशूच्या शिंगांपासून तीन लिंगे घेतली. ती आपल्यासमान मानून धारण केली. हे तर भगवान शंकरांचे लिंग आहे. हे तुला शिवसायुज्य प्राप्त करून देईल. तुला मोठ्या सद्भाग्याने हे मिळाले आहे.२०. तो (रावण) परत म्हणाला, 'मुनिराज, मला लवकर गेले पाहिजे. तुमची कथा ऐकायला मला आतां वेळ नाही.' 'अरे, संध्येची वेळ झाली आहे. संध्या सोडून कुठे चाललास?' असे नारदांनी त्याला टोंकल्यावर तो संध्येला बसला.२१.

**अत्रान्तरे गणेशोऽपि वर्णिलिङ्ग्याययौ स तम् । करे कृत्वाऽब्रवीत्कोऽसि कस्य पुत्रः क्व गच्छसि ॥२२॥**
**सोऽप्याहोमाशंकरौ मे पितरौ देयमस्ति ते । किं ताभ्यां भो न चेत्पाणिं मोचयाशु बिभेम्यहम् ॥२३॥**
**रावणोऽप्याह नादेयं ताभ्यां लिङ्गं क्षणं वह । हैमीं मे गौरवाल्लङ्कां दर्शयामि सुखं वस ॥२४॥**
**बालेनैवोरु लिङ्गं नो धार्यतेऽपि न गम्यते । लङ्का घोरेत्यपि प्रोक्तः स तमाश्वास्य तद्ददौ ॥२५॥**
**दत्तलिङ्गोऽब्धितीरे स सांध्यां कर्तुं क्रियां ययौ । बालोऽप्याह त्रिराहूय नागते स्थापयामि कौ ॥२६॥**

अत्रान्तरे वर्णि+लिङ्गी गणेशः अपि आययौ। सः तं करे कृत्वा अब्रवीत्। 'कः असि?', 'कस्य पुत्रः?', 'क्व गच्छसि?'२२। सः अपि आह। 'उमा-शंकरौ मे पितरौ। ताभ्यां ते देयं अस्ति किम्? न चेत्, भोः आशु पाणिं मोचय। अहं बिभेमि।'२३। रावणः अपि आह, 'ताभ्यां न आदेयम्। क्षणं लिङ्गं वह। (ततः तुभ्यं) गौरवात् मे हैमीं लंकां दर्शयामि। (तत्र त्वं) सुखं वस।२४। 'बालेन एव(मया) ऊरु लिंगं नो धार्यते। घोरा लंका अपि न गम्यते। इति प्रोक्तः सः (रावणः) तम् आश्वास्य तत् (लिंगं) ददौ।२५। दत्तलिंगः सः सांध्यां क्रियां कर्तुं अब्धितीरे ययौ। बालः अपि आह, '(त्वां) त्रिः आहूय (त्वया) नागते लिंगं कौ (भुवि) स्थापयामि'।२६।

इतक्यांत ब्रह्मचारी वेषाने गणेशही तेथे आले. त्याने (रावणाने) त्याला प्रेमाने हाताला धरून विचारले, बाळा, तूं कोण? कुणाचा पुत्र आहेस? कुठे चाललास?२२. मुंज्याच्या वेषांतील गणपतीही त्याला म्हणाला, 'उमा माझी माता आहे आणि शंकर माझे पिता. ते तुझे कांही देणे लागतात कां? नसेल तर हे राक्षसा, लवकर माझा हात सोड. मला तुझी भीती वाटते!'२३. असे बोलणाऱ्या त्याला रावण त्याला म्हणाला, 'नाही रे! तुझ्या आईवडिलांकडून माझें कांही येणे नाही. हे माझे लिंग थोडा वेळ धर. तुला माझी सोन्याची लंका दाखवीन. तूं तिथे सुखाने राहा.'२४. 'मला पोराला हे जड लिंग धरवणार नाही; (तुझी) लंका भीषण वाटते' असे कुरकुरणाऱ्या गणेशाला कसेबसे समजावून ते लिंग (बळेच) त्याच्या हातांत दिले.२५. अशा रीतीने लिंग गणेशाच्या हातीं ठेवून तो रावण संध्याकर्म करण्यासाठी समुद्रकिनारी गेला. बालगणेशाने त्याला बजावले, 'तुम्हांला तीन वेळां हांका मारून तुम्ही आला नाही तर हे भारी लिंग मी जमिनीवर ठेवीन.'२६.

**इत्युक्त्वा किञ्चिद्विश्रम्य स्वः पश्यत्सु सुरेषु तम् । त्रिराहूय हरिं स्मृत्वा लिङ्गं सोऽस्थापयद्भुवि ।।२७।।**
**सोऽपेत्य स्थापितं दृष्ट्वा सन्ताड्यार्भं भुजैस्तु तत । उद्धर्तुमैच्छत्क्ष्मा तेन चकम्पेऽप्यचलं तु तत् ।।२८।।**
**महाबलेश्वर इति लिङ्गं तत्संज्ञितं ततः । गोकर्णवद्बलोद्धृत्या जातं तत्संज्ञितं स्थलम् ।।२९।।**
**कैलासोऽयं क्षितौ साक्षाद्यत्रेशः परिवारयुक् । सदा जागर्त्यतस्तत्र स्थिता देवर्षिसज्जनाः ।।३०।।**
**देवर्ष्यसुररक्षोनृ-तिर्यग्भिर्यत्र शंकरात् । लब्धोऽभीष्टो वरो नान्यदितः सत्पावनं स्थलम् ।।३१।।**

इति उक्त्वा सः किंचित् विश्रम्य स्वः सुरेषु पश्यत्सु तं (रावणं) त्रिः आहूय, हरिं स्मृत्वा लिंगं भुवि अस्थापयत्।२७। सः अपि एत्य (लिंगं) स्थापितं दृष्ट्वा अर्भं संताड्य भुजैः तत् (लिंगं) उद्धर्तुं ऐच्छत्। तेन क्ष्मा चकम्पे। तत् (लिंगं) तु अचलं (जातम्)।२८। तत् लिंगं महाबलेश्वर इति संज्ञितम्। ततः बल+उद्धृत्या गोकर्णवत् जातम्। तत् (गोकर्ण)संज्ञितं स्थलं (लिगं च जातम्)।२९। अयं क्षितौ साक्षात् कैलासः (अस्ति)। यत्र ईशः परिवारयुक् सदा जागर्ति। अतः तत्र देव+ऋषि+सज्जनाः स्थिताः।३०। यत्र देव+ऋषि+असुर+रक्षः+नृ+तिर्यग्भिः अभीष्टः वरः लब्धः। इतः अन्यत् सत्पावनं स्थलं न।३१।

एवढे बोलून गणेशाने थोडा वेळ वाट पाहून, (कौतुक पहायला जमलेल्या) स्वर्गस्थ देवांच्या साक्षीने त्याला (रावणाला) तीन वेळां बोलावून विष्णुस्मरणपूर्वक लिंग भूमीवर स्थापन केले.२७. त्या असुरानेही परत येऊन लिंग खाली ठेवलेले पाहून त्या मुलाला टोले देऊन आपल्या भुजांनी तें लिंग उचकटायचा प्रयत्न केला. त्याने भूमीसुद्धा कम्पित झाली; पण ते लिंग मात्र अचलच राहिले.२८. त्यावरून त्या लिंगाला महाबलेश्वर असे नांव पडले! तसेच जोराने उचकटल्याने ते गाईच्या कानाच्या आकाराचे झाले. त्यामुळे ते स्थळ आणि लिंग गोकर्ण या नांवाने ओळखले जाऊं लागले.२९. हा भूमीवर साक्षात् कैलासच आहे जिथे भगवान सदाशिव सपरिवार भक्तांच्या कामना पूर्ण करीत सदैव जागे असतात. म्हणजेच म्हणून तिथे देवता, ऋषी आणि साधुसंत यांचाही नित्य वास असतो.३०. जिथे देव, ऋषी, असुर, राक्षस, मानवच काय पण प्राण्यांनाही ईप्सित वराची प्राप्ती झाली आहे अशा या गोकर्णासमान शीघ्र पावन करणारे स्थान दुसरे नाही.३१.

**शृणु किञ्चिद्वसिष्ठेन शप्तोऽज्ञानकृतागसः । राक्षसत्वं द्वादशाब्दं प्राप मित्रसहो नृपः ॥३२॥**
**तदाहनद् द्विजं तत्स्त्रीः शापान्ते नृप पूर्ववत् । भूत्वाप्येष्यसि मच्छापाद्रतेऽन्तमिति तं जगौ ॥३३॥**

शृणु किञ्चित्। अज्ञानकृत+आगसः मित्रसहः नृपः वसिष्ठेन शप्तः द्वादश+अब्दं राक्षसत्वं प्राप।३२। तदा द्विजं अहनत्। तत्+स्त्रीः तं जगौ, 'हे नृप! शापान्ते पूर्ववत् भूत्वा अपि मत्+शापात् रते (तव) अंतम्।'इति।३३।

सिद्ध मुनि नामधारकाला सांगत आहेत, 'जरा ऐक! इथे पुराणातील एका कथेचा संदर्भ आहे. एकदां मित्रसह नांवाच्या इक्ष्वाकु वंशांतील राजाने अरण्यातील एका राक्षसाचा वध केला. त्या राक्षसाच्या भावाने कपटाने राजाचा सेवक होऊन त्याची मर्जी संपादन केली आणि सूडासाठी योग्य संधीची वाट पाहूं लागला. एकदां आपल्या घरी आलेल्या वसिष्ठांना भोजनाचे आमंत्रण देऊन राजा कांही कार्यांत व्यस्त झाला असतां तिथे राक्षसाने वसिष्ठांचे रूप धरून जेवणासाठी मृगमांसाची मागणी केली. राजाने त्याप्रमाणे व्यवस्था केली. जेवायला वाढतांना त्या कपटवेषांतील राक्षसाने मृगमांसाऐवजी नरमांसच आणून वाढले. वसिष्ठ मुनींनी रागावून राजाला शाप दिला. 'आपण मागणी केल्यानुसार सर्व पाक केला असतांना हा उगीचच मला शाप दिलात. आतां मीसुद्धां आपणांस शाप देतो,' असे म्हणून राजानेही हातांत पाणी घेतले. एवढ्यांत त्याची राणी मध्ये पडली आणि राजाला प्रार्थनेने गुरुशापाच्या दुष्कर्मापासून परावृत्त केले. वसिष्ठांनाही ध्यानाद्वारे झालेला सर्व प्रकार लक्षांत आला. तेव्हा ते म्हणाले, माझा शब्द खरा होणारच; पण शापानुसार तू बारा वर्षे ब्रह्मराक्षस होऊन परत राजा होशील. तेव्हां राजाने हातांतले शापजल खाली सोडून दिले ते त्याच्या पायांवर पडले. त्यायोगें तो कल्माषपाद नांवाचा ब्रह्मराक्षस झाला.३२. त्या राक्षसावस्थेत असतांना राजाने अरण्यातील वाटेने जाणाऱ्या ब्राह्मण दंपतीपैकी पतीला, त्याची पत्नी सारखी काकुळतीने परावृत्त करीत असातांनाही, मारून खाऊन टाकले. त्या वेळी आपल्या पतीच्या अस्थी सांवडतांना ती ब्राह्मणी म्हणाली, 'अरे राजा! शापाचा काळ संपल्यावर जेव्हा तू पुनश्च राजा होशील तेव्हां स्त्रीशी समागम करतांच तुझा अंत होईल!'३३.

**अथैष पूर्ववद्भूत्वा स्वं राज्यं प्राप्य दुःखितः । स्मरातुरायै महिष्यै साध्वीशापं शशंस राट् ।।३४।।**
**ततः खिन्नावुभौ तीर्थ-यात्रासक्तौ यदृच्छया । आयान्तं गौतमं दृष्ट्वा सर्वं तस्मै शशंसतुः ।।३५।।**
**गौतमोऽप्याह भो मा भीर्गोकर्णेऽघौघहारिणि । कामिकल्पद्रुमे क्षेत्रे किं भवेद्ब्रह्महत्यया ।।३६।।**
**तीर्थानि सर्व तोयानि शैवलिङ्गानि ताः शिलाः । लिङ्गतीर्थमये तत्र दिव्ये किं दुर्लभं नृणाम् ।।३७।।**

अथ एष पूर्ववत् भूत्वा राज्यं प्राप्य दुःखितः कामातुरायै महिष्यै राट् साध्वी शापं कथयामास।३४। ततः उभौ खिन्नौ तीर्थ+यात्रा+सक्तौ यदृच्छया गौतमं आगतं दृष्ट्वा तस्मै सर्वं शशंसतुः।३५। गौतमः अपि आह, भो (राजन्), मा भीः। अघ+ओघ+हारिणि कामि+कल्पद्रुमे गोकर्णे क्षेत्रे (विद्यमाने) ब्रह्महत्यया किं भवेत्?३६। तत्र सर्व तोयानि तीर्थानि, ताः शिलाः शैवलिङ्गानि। तत्र लिङ्ग+तीर्थमये (क्षेत्रे) नृणां किं दुर्लभम्?३७।

बारा वर्षांनी राक्षसत्वाचा परिहार झाल्यावर तो पूर्वीप्रमाणे राज्यकारभार पाहूं लागला. पण ब्रह्महत्येचे पाप आणि त्या ब्राह्मणीचा शाप यांमुळे तो दुखीकष्टी असायचा. एकदां त्याची राणी कामातुर होऊन त्याच्याकडे आली असतांना तिला राजाने आपल्याला झालेला साध्वीचा शाप निवेदन केला.३४. तेव्हां दोघेही दुःखीकष्टी झाले आणि ब्रह्महत्येच्या परिमार्जनासाठी तीर्थयात्रेला निघाले. त्यावेळी स्वेच्छेने भूमीपर्यटण करणारे गौतम ऋषी त्यांना दिसले. त्यांचा यथोचित सत्कार करून त्या पतिपत्नींनी त्याना आपले दुःख निवेदन केले.३५. गौतमांनी राजाला धीर दिला. म्हणाले, ‘अरे राजा! गोकर्णासारखे पापांचे पुंज नष्ट करणारे आणि सकाम लोकांना कल्पवृक्षासारखे इष्ट देणारे क्षेत्र या भूतलावर असतांना ब्रह्महत्येचे काय भय धरतोस?३६. तिथे सर्वच जलाशय आणि जलप्रवाह तीर्थस्वरूप आहेत. महापापीसुद्धां ज्यांच्यायोगे तरून जातो (‘तीर्यते अनेन’) त्याला तीर्थ म्हणतात. तसेच तेथील सर्वच दगड-धोंडे ही अर्चनीय अशी शिवलिंगेच आहेत. अशा तीर्थ आणि लिंगांनी संपन्न असलेल्या त्या गोकर्ण क्षेत्रांत मानवांना दुर्लभ असे काय आहे?’ सर्व कांही सुलभच आहे. तीर्थांच्या दर्शन, स्पर्शन, स्नान, पान इत्यादींनी अंतःकरणाची शुद्धी होते. तसेच शिवलंगांच्या पूजेने आणि वंदनाने शंभुप्रसादाने चित्ताची एकाग्रता लाभते. अशा प्रकारे मोक्षसुद्धा सुलभच आहे, हेच इथे सुचविले आहे.३७.

**शृणु तत्र मया दृष्टा चण्डाल्येका मृता तु ताम् । शिवदूता विमानेन कैलासं नेतुमागताः ।।३८।।**
**मया पृष्टास्तु ते प्रोचुः प्राग्वृत्तं शृणु गौतम । प्राग्भवे विप्रकन्येयं बाल्येऽभूद्विधवा विधेः ।।३९।।**
**तन्वी कामपरा नित्यं युवसौन्दर्यमोहिता । वृत्वा कान्तं विशं भेजे सौपपत्यं रहोऽपि तत् ।।४०।।**
**जातं लोकप्रसिद्धं हि मलो नाच्छाद्यतेऽपि कैः । सम्बन्धिनस्तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं तदाऽभजन् ।।४१।।**
**ततो रेमेऽपशङ्कं सा पानासक्ता मदोद्धता । विशः कुटुम्बिनी भूत्वा कन्दर्पहतचेतना ।।४२।।**

शृणु। तत्र मया एका चण्डाली मृता दृष्टा। शिव+दूताः तां विमानेन कैलासं नेतुमागताः।३८। मया पृष्टाः तु ते प्रोचुः। (हे) गौतम, प्राक् वृत्तं शृणु। इयं प्राक् भवे विप्रकन्या। विधेः बाल्ये विधवा अभूत्।३९। सा तन्वी नित्यं कामपरा युव सौंदर्य मोहिता विशं कान्तं वृत्वा रहः औपपत्यं भेजे। तत्..।४०। (तत्) लोकप्रसिद्धं जातम्। मलः कैः अपि न आच्छादते। तदा सम्बन्धिनः तु तां त्यक्त्वा प्रायश्चित्तं अभजन्।४१। ततो सा कन्दर्पहतचेतना विशः कुटुम्बिनी भूत्वा पानासक्ता मदोद्धता अपशङ्कं रेमे।४२।

'राजा मी प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत सांगतो ती ऐक. मी तिथे (गोकर्ण क्षेत्रांत) एक चांडाळीण मरतांना पाहिली. तर काय आश्चर्य, तिला कैलासावर नेण्यासाठी शिवदूत विमान घेऊन आले.'३८. मी त्यांना विचारल्यावर ते मला म्हणाले, 'अहो गौतम ऋषी, हिचा पूर्वींचा वृत्तांत ऐका. मागील जन्मी ही ब्राह्मणकन्या होती. दैवगतीने ती बालपणीच विधवा झाली.३९. ती रूपवती आणि सतत कामचिंतनाने तरुणांच्या सौंदर्याने मोहित होत असे. एकदां तिने एका गोऱ्यागोमट्या वैश्य तरुणासह व्यभिचाराने संबंध ठेवला. चोरून केले तरी ते दुष्कृत्य.४०. लोकांत प्रकट झालेच. पाप कुणाला (**कैः**) झांकून ठेवतां येत नाही. **कैः** म्हणजे पाण्याने मल (विष्टा) झांकतां येत नाही असाही अर्थ लावतां येईल. तेव्हा तिच्या नातेवाइकांनी तिला घराबाहेर काढून संसर्गदोषाच्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त घेतले.४१. मग तर कामविकाराने विवेकशून्य होऊन मद्याच्या आहारी जाऊन त्याच धुंदींत ती वैश्यासह राजरोस संसार करूं लागली.४२.

**प्रमत्ता सैकदा वत्सं मेषभ्रान्त्या निहत्य कम् । स्थापयित्वाऽत्तुमन्येद्युः शेषं पक्त्वा चखाद ह ।।४३।।**
**ज्ञात्वाऽथ गोशिरो जार-भीत्या निक्षिप्य तद्भुवि । व्याघ्रेणापहृतो वत्सः शिवेत्थं पर्यदेवयत् ।।४४।।**
**इत्याद्यवाच्यपापानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समम् । दारुणां दुर्गतिं भुक्त्वा जातेदृश्यघशेषतः ।।४५।।**
**जन्मतोऽस्या गलत्कुष्ठ आन्ध्ये सत्यपि रक्षिता । पितृभ्यां तावपि मृतौ ततोऽनाथा रुरोद सा ।।४६।।**
**संगत्य यात्रिकैः सत्रा माघे दैवादिहागता । क्षुधिता शिवरात्रौ सा ययाचेऽन्नं सुदुःखिता ।।४७।।**

एकदा सा प्रमत्ता मेष+भ्रांत्या वत्सं निहत्य कं अन्ये द्युः अत्तुं स्थापयित्वा शेषं पक्त्वा चखाद ह।४३। अथ गोशिरो ज्ञात्वा तत् जार+भीत्या भुवि निक्षिप्य 'शिव (शिव), वत्सः व्याघ्रेण अपहृतः' इत्थं पर्यदेवयत्।४४। (सा) इत्यादि अवाच्य पापानि कृत्यानि कृत्वा प्रेत्य स्वकैः समं दारुणां दुर्गतिं भुक्त्वा अघशेषतः ईदृशी जाता।४५। अस्या जन्मतः गलत्कुष्ठम्। आन्ध्ये सति अपि (सा) पितृभ्यां रक्षिता। तौ अपि मृतौ। ततः अनाथा सा रुरोद।४६। दैवात् सा माघे यात्रिकैः सत्रा इह आगता। सा क्षुधिता सुदुःखिता शिवरात्रौ अन्नं ययाचे।४७।

एकदां दारू पिऊन तर्र असतांना तिने बकरा समजून गाईचे वांसरूंच कापले आणि डोके दुसऱ्या दिवशी खायला शिंक्यावर ठेवून बाकीचे शिजवून खाऊन टाकले.४३. सकाळी ते वांसराचे डोके पाहून, ते तिने जाराच्या भीतीने जमिनीत गाडून टाकले आणि 'देवा, देवा! वासरूं वाघाने धरून नेले हो!' असे म्हणून खोटेच रडूं लागली.४४. अशी जिभेवर आणण्यासही अनुचित अनेक दुष्कृत्ये करून मेल्यावर आपल्या संबंधितांसह दारुण नरकांत पिचून पापाचा भोग झाल्यावर उर्वरित पापामुळे ती ही अशी चांडाळाच्या घरी जन्म पावली.४५. हिला जारकर्माच्या फलस्वरूप हिचे शरीर जन्मतःच कुष्ठग्रस्त होते. तसेच गाईचे वांसरूं मारल्याने ती आंधळी होती. अशा अवस्थेत आईवडील होते तोंपर्यंत त्यांनी तिचा सांभाळ केला. त्यांच्या मृत्यूनंतर ती लाचार होऊन दुःखाकष्टांत कशीबशी जगूं लागली.४६. दैवयोगाने ती यात्रेकरूंच्या बरोबर माघ महिन्यात इथे (गोकर्ण क्षेत्रांत) आली. शिवरात्रीच्या दिवशी भुकेने कासावीस होऊन ती येणाऱ्याजाणाऱ्यांकडे खायला मागूं लागली.४७.

**जनैस्तदाशनाभावात्प्रसारितकरेऽर्पितम् । बिल्वमाघ्राय तत्याज मत्वाऽभक्ष्यं सुदुःखिता ।।४८।।**
**लिङ्गे त्यक्तं तु तत्पूजा श्रुतमह्नीशकीर्तनम् । उपवासोऽशनाभावाद् दुःखाज्जागरणं निशि ।।४९।।**
**एवं साङ्गं व्रतं चीर्णं तेन भूत्वा सुनिर्मला । मृताऽद्यात्र शिवाज्ञप्ताः स्म आनेतुमिमां द्रुतम् ।।५०।।**
**तैरित्युक्त्वाऽमृतं सिक्त्वा विमानाग्रे निधाय ताम् । जग्मुः कैलासं सहोत्थ-क्रियागतिरियं त्विह ।।५१।।**

तदा अशन+अभावात् (तस्याः) प्रसारित+करे अर्पितम् बिल्वं आघ्राय सा सुदुःखिता अभक्ष्यं मत्वा तत्याज।४८। लिङ्गे त्यक्तं तत् तु पूजा जाता। अह्नि ईश+कीर्तनम् श्रुतम्। अशन+अभावात् उपवासो (जातः)। निशि दुःखात् जागरणं (जातम्)।४९। एवं व्रतं सांगं चीर्णम्। तेन (सा) सुनिर्मला भूत्वा अद्य अत्र मृता। (वयं) इमां (कैलासं) आनेतुं शिव+आज्ञप्ताः स्म।५०। तैः इति उक्त्वा अमृतं सिक्त्वा तां विमान+अग्रे निधाय कैलासं जग्मुः। इयं तु इह सह+उत्थ+क्रिया+गतिः।५१।

तेव्हां (सगळ्यांना उपवास असल्याने) खाद्य वस्तूंच्या अभावी तिच्या पुढे केलेल्या हातावर कुणी तरी बेलाचे पानच टाकले. तिने ते हुंगून पाहतां खाण्यायोग्य नाही असे जाणून चरफडत टाकून दिले.४८. ते लिंगावर जाऊन पडले. तीच पूजा झाली! दिवसभर देवाचे भजन कांनांवर पडले. खायला कांहीच न मिळाल्याने उपास घडला. रात्रभर दुखाने तळमळत झोंप कसली येणार?४९. 'असे तिच्याकडून हे शिवरात्रीचे व्रत, शिवार्चन, उपोषण, जागरण, कीर्तन या सर्व अंगासहित, यथासांग पार पडल्याने तिच्या पापांचे क्षालन होऊन ती अतीव शुद्ध झाली आणि आजच्या ह्या पवित्र दिवशी या पावन क्षेत्री हिला मृत्यू आला. त्यामुळे भगवान महादेवांनी आम्हांला हिला कैलासावर घेऊन येण्याची आज्ञा केली आहे.'५०. त्यांनी असे सांगून तिच्यावर अमृत शिंपून तिला विमानांत पुढे बसविले आणि कैलासाला निघून गेले. असे बोलून गौतम राजाला म्हणाले, 'ही ह्या भूलोकांत सहज घडलेल्या कर्माने प्राप्त होणारी सामान्य गती आहे.५१.

**विदुषस्तु फलाधिक्यं ज्ञात्वेदं गच्छ मुच्यसे । तच्छ्रुत्वा द्राङ् नृपो गत्वा क्षणान्मुक्तो बभूव ह ।।५२।।**
**गोकर्णमीदृशं क्षेत्रं सत्तमं सज्जनाश्रयम् । अतस्तत्रैव तस्थौ हि श्रीपादः साधुजीवनः ।।५३।।**
**मोचयित्वा सतोऽब्दांस्त्रींस्तत्रोषित्वा गतागतात् । कृष्णातटे कुरुपुरं प्राप्यादृश्योऽभवत्स तु ।।५४।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे गोकर्णवर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ।।६।।**

विदुषस्तु फलाधिक्यं इदं ज्ञात्वा गच्छ। तत् श्रुत्वा नृपः (गोकर्णं) द्राक् गत्वा क्षणान् मुक्तो बभूव ह।५२। ईदृशं सत्तमं सज्जन+आश्रयं गोकर्णं क्षेत्रम् (अस्ति)। अतः साधु+जीवनः हि श्रीपादः तत्र एव तस्थौ।५३। सतः गतागतात् मोचयित्वा तत्र त्रीन् अब्दान् उषित्वा कृष्णातटे सः कुरुपुरे प्राप्य तु अदृश्यो अभवत्।५४।

'जाणून कर्म केलेल्या कर्माचे फळ यापेक्षां अधिकच आहे हे समजून, हे राजा तूं गोकर्णाला जा.' ज्ञानी पुरुषाला कर्माचे अधिक फळ मिळते याचा अर्थ ते मोक्षपर्यवसायी होते. यावर कुणी असा निष्कर्ष काढला की ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने मोक्ष मिळतो तर ते बरोबर नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:१६) *'कर्मणा पितृलोको विद्यया देवलोक'* असे ज्ञानयोग आणि कर्मयोगाचे भिन्न फळ सांगितले आहे. त्यामुळे एकच साधक त्या दोन्हींचे एकाच वेळी अनुष्ठान करूं शकत नाही. कर्मयोगाने ज्ञानाचा अधिकार प्राप्त करून घेऊन मग कर्मसंन्यास केल्यावरच ज्ञानयोगाची साधना शक्य आहे. ह्या ठिकाणी ज्ञान म्हणजे क्रियेसंबंधाचे ज्ञान असाच घ्यावा लागेल. अशाच ज्ञानाने कर्माचे अनुष्ठान शक्य आहे. *'विद्यां चाविद्यां च'* इत्यादि श्रुतींत (ईशावास्योपनिषत् ११) विद्येने अमृतत्वाची प्राप्ती प्रतिपादलेली आहे. हे अमृतत्व सापेक्ष आहे. जिथे मृत्यू नाही अशा देवत्वाला (*अमृतं देवात्मभावम्* - भ.पू.पा. शंकराचार्य) अमृतत्व म्हटले आहे. मोक्ष अद्वितीय आत्मज्ञानानेच होतो. राजा गोकर्णाला जाऊन मुक्त झाला म्हणजे दोषमुक्त झाला आणि

ज्ञानाचा अधिकारी झाला असा अर्थ आहे.५२. असे हे गोकर्ण परमपवित्र क्षेत्र साधुसंतांना आश्रयभूत आहे. म्हणून संतांचा प्राणच असे श्रीपाद तिथेच राहिले.५३. सज्जनांना जन्ममरणरूपी संसारापासून सोडवीत तिथे (गोकर्ण क्षेत्री) राहून ते श्रीपाद कृष्णाकांठी कुरुगड्डी येथे जाऊन अदृश्य झाले.५४.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सहावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## । अथ सप्तमोऽध्यायः।

### ।। नामधारक उवाच ।।

**साधूनुद्धर्तुकामोऽथ कुतो लीलाविहार्यभूत् । अदृश्यो भगवांस्तत्तु श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**अतीन्द्रियोऽपि दृश्योऽत्र भूत्वा लीलात्मना पुनः । अवतारप्रसङ्गेन जातोऽदृश्य इदं शृणु ।।२।।**

**तत्राभूच्छान्दसः कश्चिदम्बिका नाम तद्वधूः । कुपुत्रं सुषुवे दैवात्स्तब्धं हीनमतिं जडम् ।।३।।**

अथ साधून् उद्धर्तुकामः लीलाविहारी भगवान तु कुतो अदृश्यो अभूत्? तत् सादरं श्रोतुं इच्छामि।१। अतीन्द्रियः अपि लीलात्मना दृश्यः भूत्वा पुनः अवतारप्रसंगेन अदृश्यः जातः। इदं शृणु।२। तत्र कश्चित् छांदसः अभूत्। तत्+वधूः अम्बिका नाम दैवात् स्तब्धं, हीनमतिं, जडं कुपत्रं सुषुवे।३।

श्रीगणेशाय नमः। मागच्या अध्यायांत 'श्रीगुरू साधूंना जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवतात' असे सांगितले; ते कोणत्या साधनाने?, हा प्रश्न अपेक्षून, विशेषतः मंद अधिकाऱ्यांसाठी, 'ज्ञानयोगांतच अंतर्भूत असलेल्या भक्तियोगाने', असे उत्तर ह्या अध्यायात दर्शविले आहे. **सातव्या अध्यायी ब्राह्मणीचे दुःख परिहरले। चोरांस मारून मृत द्विजास उठवीले।।** नामधारक विचारतात, साधूंचा उद्धार करूं इच्छिणारा लीलादेहाने विचरणारा भगवंत कां अदृश्य झाले हे मी आदरपूर्वक ऐकूं इच्छितो.१. सिद्धमुनी सांगतात, मन, बुद्धी, इंद्रियांना अगोचर असलेले श्रीदत्तप्रभू लीलादेहाने प्रकट झाले. पुढे पुन्हां दुसरा अवतार घ्यायचा असल्याने ते अंतर्धान पावले; ती गोष्ट सांगतो, ऐक.२. तिथे कुरुपुरांत एक वैदिक ब्राह्मण आपली पत्नी अंबिकेसह राहत होता. दैवयोगाने तिने एका मठ्ठ, मंदमती, वेडसर मुलाला जन्म दिला.३.

**वर्णधर्मोपनीतं तं सावित्र्युच्चारणाक्षमम् । ताडयन्तं निवार्याह स्वपतिं वैदिकं वधूः ।।४।।**
**भो जडोऽर्भोऽश्मवद्योनेरेवालं खेदहेतुना । ताडनेन त्यजाम्यस्मिंस्ताडितेऽसून्सुधीरिति ।।५।।**
**सोऽप्यजाकण्ठकुचवत्तं मत्वाश्रुत्य तद्वचः । तूष्णीं तस्थौ ततो विप्रः कालेनाल्पीयसा मृतः ।।६।।**
**तत्र पुत्रान्विता माता जीवनं याच्ञयाऽकरोत् । काले याते कियत्येवं निन्दां चक्रुर्द्विजोत्तमाः ।।७।।**

वर्णधर्म+उपनीतं (अपि) सावित्री+उच्चारण+अक्षमं तं ताडयन्तं वैदिकं स्वपतिं निवार्य वधू आह।४। भो योनेः+एव अर्भः अश्मवत् जडः (अस्ति)। खेदहेतुना (तस्य) ताडनं अलम्। सुधीः, अस्मिन् ताडिते असून् त्यजामि।५। सः अपि तत्+वचः श्रुत्वा, तं अजा+कंठ+कुच+वत् मत्वा तूष्णीं तस्थौ। ततो अल्पीयसा कालेन विप्रः मृतः।६। पुत्र+अन्विता माता तत्र याच्ञया जीवनं अकरोत्। एवं कियति काले याते द्विज+उत्तमाः निन्दां चक्रुः।७।

आठव्या वर्षी ब्राह्मणाची मुंज करावी ह्या धर्माज्ञेप्रमाणे त्याच्या पित्याने त्याची मुंज लावून दिली तरी त्याला गायत्रीमंत्राचा साधा उच्चारही करतां येईना. त्यामुळे त्याच्यावर रागावून तो वैदिक ब्राह्मण त्या मुलाला मारूं लागला. ते न पाहवून त्याची पत्नी त्याला अडवून म्हणाली.४. 'अहो नाथ! जन्मतःच हा बाळ दगडासारखा बुद्धिहीन आहे. त्याच्यावर रागावून काय उपयोग आहे? आपण वैफल्याने त्याला असे ऊठसूट मारूं नका. आपण सूज्ञ आहांत. याउप्पर त्याला असे बडवाल तर मीच जीव देईन!'५. त्या ब्राह्मणानेही तिचे ते बोलणे ऐकले आणि 'हा शेळीच्या गळ्याला लोंबणाऱ्या स्तनाप्रमाणे निरुपयोगी आहे' असा विचार करून गप्प राहिला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी तो ब्राह्मण मरण पावला.६. मग ती माता आपल्या पुत्राबरोबर त्या कुरुपुरांत भिक्षा मागून चरितार्थ चालवूं लागली. असा कांही काळ गेल्यावर त्या गांवातले श्रेष्ठ ब्राह्मण त्याची निंदा करूं लागले.७.

**सूर्यर्च्यजैषा वृत्तिस्ते गर्ह्याऽस्माकं न रोचते । इतो व्रज त्यजासून्वा तैरित्युक्तो नदीं ययौ ।।८।।**
**कृष्णाविष्टं समं मात्रा मर्तुकामं विलोक्य तौ । निषिध्योचेऽनुकम्पार्द्रः श्रीपादस्तीरवास्यसौ ।।९।।**
**साहसं मा कुरु ब्रह्मन्नात्महत्या हि दुर्वहा । भवे भवेऽप्यतोऽत्रैव सम्प्राप्तसहनं वरम् ।।१०।।**

हे सूरि+अर्च्यज! ते एषा गर्ह्या वृत्तिः अस्माकं न रोचते। इतो व्रज वा असून त्यज।८। तैः इति उक्तः (पुत्रः) मात्रा समं मर्तु+कामं नदीं ययौ। कृष्णाविष्टं तौ विलोक्य असौ तीरवासी श्रीपादः अनुकम्पा+आर्द्रः उचे।९। हे ब्रह्मन्! साहसं मा कुरु। आत्महत्या हि दुर्वहा। अतो भवे भवे अत्र एव संप्राप्त+सहनं वरम्।१०।

'विद्वानांत पूज्य असलेल्या पित्याच्या पोटी जन्म घेऊन तू ही जी आईच्या भिकेवर पोट भरण्याची निंद्य वृत्ती अवलंबिली आहेस ती आम्हांला रुचत नाही. तूं इथून निघून जा किंवा कुठे तरी जाऊन जीव दे!' त्यांच्या ह्या वक्तव्याने व्यथित होऊन तो मुलगा आपल्या मातेसह जीव देण्यासाठी नदीवर गेला.८. जीव देण्यासाठी कृष्णेत प्रवेश करणाऱ्या त्या मायलेकरांना पाहून तीरावर असलेल्या ह्या श्रीपादप्रभूंना दया आली आणि ते म्हणाले.९. 'अरे ब्राह्मणा! असा अविचार करूं नकोस. जाणीवपूर्वक ब्राह्मणाने आत्महत्या केली तर आत्महत्येच्या पापाबरोबरच ब्रह्महत्येचेही पाप लागते. ईशावास्य उपनिषदात(३) सांगितल्याप्रमाणे आत्महत्या करणारे लोक मृत्यूनंतर सूर्यरहित गाढ अंधाराच्या लोकांत जातात. म्हणून जन्मोजन्मी आपल्या प्रारब्धाने जे जे कष्ट प्रप्त होतील ते ते भोगणेच बरे आहे.'१०.

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**प्राज्ञोद्भूतकुपुत्रत्व-हेतुनैवाखिला हि माम् । धिक्कुर्वन्त्यपि नेक्षन्ति तत्किं कार्यमतःपरम् ॥११॥**

॥ श्रीपाद उवाच ॥

**हत्यया लिप्स्यसेऽग्रेऽतो दुःखं निस्तीर्य दैविकम् । शिवतोषात्सुपुत्रस्ते भविष्यति भवान्तरे ॥१२॥**

॥ ब्राह्मण्युवाच ॥

**त्वयोक्तं साध्वहं कुर्यां तथैव तु कथं भवेत् । शिवतोषः पुरा केन कृतः श्रावय विस्तरात् ॥१३॥**

ब्राह्मणी उवाच। प्राज्ञ+उद्भूत+कुपुत्र+हेतुना एव अखिला (जना) मां धिक् कुर्वति हि। न ईक्षन्ति अपि। तत् अतः परम् किं कार्यम्?।११। श्रीपाद उवाच। हत्यया लिप्स्यसे। अतो दैविकं दुःखं निस्तीर्य अग्रे शिव+तोषात् भव+अंतरे ते सुपुत्रः भविष्यति।१२। ब्राह्मणी उवाच। त्वया साधु उक्तम्। अहं तु तथा एव कुर्याम्। शिवतोषः कथं भवेत्, पुरा केन कृतः (तत्) विस्तरात् श्रावय।१३।

मुलगा कांहीच बोलला नाही. आईनेच सांगितले. विद्वानाच्या पोटी हा नतद्रष्ट जन्माला आला. ह्याच गोष्टीवरून सर्वजण माझा धिक्कार करतात. आम्हांला डोळ्यांसमोरही येऊं देत नाहीत. अशा परिस्थितीत आम्ही (जीव देण्यावांचून दुसरे) काय करणार?११. श्रीपाद म्हणाले, '(तसे करशील तर) (आत्म)हत्येचा दोष लागेल. यासाठी कर्माने प्राप्त झालेले दुःख भोगून टाक. पुढे जर शंकराला (उपासनेने) प्रसन्न करशील तर जन्मांतरी तुला चांगला मुलगा होईल.'१२. ब्राह्मणी म्हणाली, 'आपण उत्तम सांगितले. मी अवश्य त्याचप्रमाणे करीन. भगवान शिव कसे प्रसन्न होतील? पूर्वी कुणी त्यांना अशा रीतीने प्रसन्न केले? हे मला आपण विस्ताराने सांगाल तर माझीही श्रद्धा आणि भक्ती दृढ होऊन मी तसे करीन.'१३. श्रीपाद सांगूं लागले, 'पूर्वीं उज्जैन नगरीत चंद्रसेन नांवाचा राजा होता. त्याचा मणिभद्र नांवाचा मित्र शंकराचा भक्त होता. त्याला भगवान शंकरांनी प्रसन्न होऊन इच्छिलेली वस्तू देणारा चिंतामणी दिला.१४.

## ।। श्रीपाद उवाच ।।

**उज्जयिन्यां पुरा चन्द्र-सेनराजसखोऽलभत् । मणिभद्रः शिवाच्छैवश्चिन्तामणिमभीष्टदम् ।।१४।।**
**तं ज्ञात्वार्घादिनाऽलभ्यं युद्धायाभ्यागतान्नृपान् । श्रुत्वाऽप्येकाग्रचित्तोऽसौ प्रदोषेऽपूजयच्छिवम् ।।१५।।**
**मन्दानङ्गप्रदोषे तं मणिं भूपं तथाविधम् । दृष्ट्वा गोपसुतास्तद्वत्स्वाङ्गणे चक्रुरर्चनम् ।।१६।।**
**गोप्यो निवार्य पत्राद्यैर्लिङ्गकल्पनयोपलम् । भजतो निन्युरत्तुं तांस्तस्थौ तत्रैकबालकः ।।१७।।**
**प्रसह्याप्युद्धृतोऽर्चां स मात्रोद्वास्यापतद्भुवि । शम्भुपूजाभङ्गभिया निर्विण्णो मर्तुमुद्यतः ।।१८।।**

श्रीपाद उवाच। पुरा उज्जयिन्यां चंद्रसेन+राज+सखः मणिभद्रः शिवात् अभीष्टदं चिंतामणिं अलभत्।१४। तं अर्घ+आदिना अलभ्यं ज्ञात्वा नृपान् युद्धाय अभ्यागतान् श्रुत्वा अपि असौ एकाग्रचित्तः प्रदोषे शिवं अपूजयत्।१५। तं मणिं, भूपं (च) मंदानंग+प्रदोषे तथाविधं दृष्ट्वा गोपसुताः स्वाङ्गणे तद्वत् अर्चनं चक्रुः।१६। लिंग+कल्पनया उपलं भजतः तां गोप्यो निवार्य अत्तुं निन्युः। तत्र एक बालकः तस्थौ।१७। मात्रा अर्चां उद्वास्य प्रसह्य उद्धृतः अपि सः शम्भु+पूजा+भंग+भिया निर्विण्णो मर्तुम् उद्यतः भुवि अपतत्।१८।

तो चिंतामणी धनादिकांच्या मोबदल्यांत मागूनही तो राजाने न दिल्यामुळे परकीय राजे सर्व बाजूंनी युद्धासाठी चालून आल्याचे समजूनही राजा आणि मणिभद्र प्रदोषकाळी एकाग्रचित्ताने शंकरांचे पूजन करीत होते.१५. त्या राजाला आणि मणिभद्राला शनिप्रदोषाच्या पर्वांत तशी पूजा करतांना पाहून कांही गवळ्याच्या मुलांनी आपल्या आंगणांत तशीच पूजा आरंभिली.१६. लिंगाच्या आकाराचा दगड ठेवून पानाफुलांनी त्यांची पूजा करणाऱ्या त्या मुलांना, त्यांच्या माता ज्या गोपी, त्यांनी जेवणासाठी ओढून नेले. सगळी मुले याप्रमाणे निघून गेली; पण एक बालक मात्र पूर्वजन्मींच्या भक्तीच्या संस्कारांमुळे पूजा टाकून न जातां तिथे तसाच बसून राहिला.१७. आईने पूजा विस्कटून त्याला जबरदस्तीने ओढूनही तो गोपीकुमार शिवपूजेचा भंग होईल या भीतीने अत्यंत खिन्न होऊन प्राण त्यागण्याच्या इच्छेने जमिनीवर पडला.१८.

**तद्भावं विश्वसाक्षीशो ज्ञात्वाऽविष्कृत्य शोभनम् । स्वं रूपं बालमाश्वास्य वरं वृण्विति तं जगौ ।।१९।।**
**बालोऽपि दिव्यरूपं तं नत्वोचे भुवनेश्वर । मात्रोत्सृष्टाऽत्र ते पूजा तन्मन्तुं क्षन्तुमर्हसि ।।२०।।**

**।। शिव उवाच ।।**

**भक्त्या सायुज्यभाङ्मेऽसि कृतं मात्रा त्वबोधतः । नायं मन्तुः सापि भूयाद्विष्णुमाताऽर्चनेक्षणात् ।।२१।।**
**इत्युक्त्वान्तर्दधे सोऽभूद्भास्वल्लिंगं य आगताः । त ऊचुः पुण्यश्लोकार्थं दोषाऽप्यर्कोऽत्र तिष्ठति ।।२२।।**
**धन्येन सह योद्धव्यं नास्माभिरिति ते नृपाः । निश्चित्य स्निग्धभावेन तौ द्रष्टुं सर्व आययुः ।।२३।।**

विश्वसाक्षी ईशः तत्+भावं ज्ञात्वा स्वं शोभनं रूपं आविष्कृत्य, बालं आश्वास्य वरं वृणु इति तं जगौ।१९। बालः अपि तं दिव्यरूपं नत्वा ऊचे, (हे) भुवनेश्वर! मात्रा ते पूजा उत्सृष्टा, तं मन्तुं क्षन्तुं अर्हसि।२०। शिव उवाच। त्वं भक्त्या मे सायुज्यभाक् असि। मात्रा कृतं तु अबोधतः। न अयं मन्तुः। सा अपि अर्चन+ईक्षणात् विष्णुमाता भूयात्।२१। इति उक्त्वा सः अन्तर्दधे। लिङ्गं भास्वत् अभूत्। ये आगताः (राजानः) ते ऊचुः अत्र पुण्यश्लोक+अर्थं दोषा अपि अर्कः तिष्ठति।२२। अस्माभिः धन्येन सह न योद्धव्यम्। इति निश्चित्य ते सर्वे नृपाः स्निग्ध+भावेन तौ द्रष्टुं आययौ।२३।

जगताचा द्रष्टा जो भगवान शंकर त्याने त्या बालकाचा भक्तिभाव जाणला आणि आपले मनोहर रूप त्याच्यापुढे प्रकट केले. त्या बाळाची समजूत घालून ते त्याला वर माग असे म्हणाले.१९. त्या गोपाळाने त्या दिव्य रूपाला नमस्कार केला आणि म्हणला, माझ्या आईने आपली पूजा मोडून टाकली त्या अपराधाची आपण क्षमा करावी.२०. भगवान शंकर उत्तरले, तुझ्या भक्तीपोटी तुला माझे सायुज्य दिले! तुझ्या आईने अजाणतां केल्याने हा अपराधच होत नाही. उलट माझी पूजा तिने पाहिली ह्या पुण्याईने ती जन्मांतरी विष्णूची आई होईल.२१.असे बोलून शिवभगवान अंतर्धान पावले. गोपबालकाने पूजिलेले ते दगडाचे लिंग एकदम सूर्यासारखे प्रकाशले. त्याचा प्रकाश नगरभर पसरलेला पाहून युद्धासाठी आलेले राजे लोक म्हणूं लागले, हा राजा केवढा पुण्यश्लोक आहे! त्याच्या नगरांत रात्रीही सूर्य थांबलेला दिसतो!२२.

**पूजां कृत्वापि राट् द्योत-हेतुं निश्चित्य तैः सह । नृपैर्गोपाङ्गणं गत्वा प्राप लिङ्गेक्षणान्मुदम् ।।२४।।**
**श्रुत्वा गोपमुखात्सर्वं तुष्टास्तस्मै नृपाः श्रियम् । दत्वा गोपाधिपत्यं च स्वं स्वं स्थानं ययुर्मुदा ।।२५।।**
**सा तु प्रेत्य यशोदाख्या गोपी भूत्वा हरिं सुतम् । प्रापेशतोषात्तस्मात्ते तथा भूयाच्छिवार्चनात् ।।२६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**कष्टाद्दैवाच्छिवे तुष्टे फलं भाव्यधुनामुना । कष्टेनायुः कथं लङ्घ्यं मातृत्वेनाव मामतः ।।२७।।**

राट् अपि पूजां कृत्वा तैः नृपैः सह द्योत+हेतुं निश्चित्य गोप+अङ्गणं गत्वा लिङ्ग+ईक्षणात् मुदं प्राप।२४। गोप+मुखात् सर्वं श्रुत्वा तुष्टाः नृपाः तस्मै श्रियं गोप+अधिपत्यं च दत्वा मुदा स्वं स्वं स्थानं ययुः।२५।

हा राजा धन्य आहे! अशाबरोबर आपण युद्ध करणे योग्य नाही, असा निश्चय करून ते सगळे राजे स्नेहभावाने त्या राजाच्या आणि मणिभद्राच्या दर्शनासाठी आले.२३. राजानेही पूजा विधिवत् संपन्न केली आणि त्या राजांसह प्रकाशाचे मूळ शोधत गवळीवाड्यात आले.२४. तिथे त्या लिंगाचे दर्शन घेऊन ते सर्व आनंदित झाले. त्या गोपाळाच्या तोंडून सर्व ऐकून सर्वही राजांना हर्ष झाला. त्यांनी त्या गोपाळाला विपुल धन देऊन गौळी समाजाचा प्रमुख केले आणि आनंदाने आपापल्या ठिकाणी निघून गेले.२५. ती गोपी मृत्यूनंतर यशोदा नांवाची गोपी म्हणून जन्मली आणि भगवान शंकरांच्या कृपेने साक्षात् विष्णूचा अवतार जो गोपाळकृष्ण, त्याची आई झाली. त्याचप्रमाणे तू शंकरांची पूजा केलीस तर तुलाही विष्णूसारखा मुलगा होईल.२६. ब्राह्मणी म्हणाली, 'प्रयासाने आणि दैवयोगाने शंकर प्रसन्न झालेच तर पुढच्या जन्मी हे फळ मिळेल. आतां ह्या मंदमती मुलासह हे कष्टमय आयुष्य कसे घालवावे? आपणच मला आई समजून माझे रक्षण करावे.'२७.

**इत्यशाठ्यं सकारुण्यं श्रुत्वा प्रीतो दयार्द्रधीः । ओमित्युक्त्वा दधौ पाणिं दुष्प्रापं मूर्खमूर्धनि ।।२८।।**
**सहसा गीष्पतिसमो बभूव श्रुतिशास्त्रवित् । मातृभक्तौ विनीतं तं नियुज्याहाम्ब मे शृणु ।।२९।।**
**विस्मृत्याऽकमनेनेश-पूजयायुःक्षयं कुरु । पुत्रो भाविभवे मादृक्ते भविष्यति वा इति ।।३०।।**
**साऽप्यत्यर्थं प्रहृष्टा तदाज्ञया सहसूनुना । ग्रामं गत्वेशमानर्च विद्वन्मान्य सुतान्विता ।।३१।।**
**मादृङ्नान्यो भवेयं चेन्नास्याः पुत्रो मृषा वचः । अतोऽवतीर्य तत्कुर्यामित्यमंस्ताज ईश्वरः ।।३२।।**

सा तु प्रेत्य यशोदा+आख्या गोपी भूत्वा ईश+तोषात् हरिं सुतं प्राप। तस्मात् ते शिव+अर्चनात् तथा भूयात्।२६। ब्राह्मणी उवाच। कष्टात् दैवयोगात् (च) शिवे तुष्टे भावि फलम्। अधुना अमुना कष्टेन आयुः कथं लङ्घ्यम्? अतः मां मातृत्वेन अव।२७। इति अशाठ्यं सकारुण्यं (वचं) श्रुत्वा दया+आर्द्र+धीः प्रीतः 'ॐ' इति उक्त्वा मूर्ख+मूर्धनि दुष्प्रापं पाणिं दधौ।२८। सः सहसा गीष्पति+समः श्रुति+शास्त्र+वित् बभूव। विनीतं तं मातृ+भक्तौ नियुज्य आह, '(हे)अम्ब! मे श्रुणु'।२९। अनेन अकं विस्मृत्य ईश+पूजया आयु+क्षयं कुरु। भावि+भवे ते मादृक् पुत्रो भविष्यति वा।३०। सा अपि अत्यर्थं प्रहृष्टा। तत् आज्ञया सूनुना सह ग्रामं गत्वा विद्वत्+मान्य सुत+अन्विता ईशं आनर्च।३१। मादृक् अन्यः न। अस्याः पुत्रः न भवेयं चेत् (मम) वचः मृषा (स्यात्)। अतः अवतीर्य तत् कुर्यां इति अजः ईश्वरः अमंस्त।३२।

हे तिचे निर्व्याज आणि काकुळतीचे बोलणे ऐकून दयाक्लिन्न अंतःकरणाचे श्रीपाद प्रसन्न झाले आणि त्यांनी 'ॐ' असे म्हणून आपला देवदुर्लभ हात त्या मठ्ठ मुलाच्या मस्तकावर ठेवला.२८. तो मंदमती मुलगा तेव्हां तत्काळ बृहस्पतीसारखा वेदशास्त्रसंपन्न झाला आणि त्याने श्रीपादप्रभूंना नमस्कार केला. त्याला आईची भक्ती करण्याचा आदेश देऊन श्रीपाद त्या ब्राह्मणीला म्हणाले, 'माते, माझे ऐक!'२९. 'ह्या तुझ्या विद्वान् पुत्रासह तूं तुझे पूर्वीचे सर्व दुःख विसरून जा आणि उरलेले जीवन शंकरांच्या पूजेत व्यतीत कर. येणाऱ्या जन्मात तुला अवश्य माझ्यासारखा पूज्य मुलगा होईल.'३०. ती ब्राह्मणीही अत्यंत आनंदित होऊन श्रीपादांची आज्ञा घेऊन आपल्या मुलासह गांवांत गेली. तिथे सर्व विद्वानांतही सन्मानित झालेल्या त्या मुलासह तिने आयुष्यभर शंकरांचे आराधन केले.३१.

**कृतावतारसङ्कल्पः कार्यानन्त्यान्न सोऽत्यजत् । लीलाङ्गं तत्र भजतामदृश्योऽप्यस्ति कामदः ।।३३।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सङ्कल्पवान्कथं कार्येऽपूर्णेऽप्यन्योऽभवत्कथम् । स्थित्वाद्यधाम्नाऽदृश्योऽपि भजतां कामदः कथम् ।।३४।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**कार्यानन्त्याद्विश्वबीजे सङ्कल्पानन्त्यमव्यये । नृणां कलिमलान्धानां स प्रत्यक्षोऽप्यदृश्यवत् ।।३५।।**

कृत+अवतार+संकल्पः सः कार्य+आनंत्यात् लीलाङ्गं न अत्यजत्। तत्र भजतां अदृश्यः अपि कामदः अस्ति।३३। नामधारक उवाच। कार्ये अपूर्णे अपि संकल्पवान् कथम्? आद्य+धाम्ना स्थित्वा अपि अन्यः कथं अभवत्? (तत्र) अदृश्यः अपि भजतां कामदः कथम्?३४। सिद्ध उवाच। विश्व+बीजे अव्यये कार्य+आनंत्यात् संकल्प+आनंत्यम्। कलि+मल+अंधानां नृणां सः प्रत्यक्षः अपि अदृश्यवत् (अस्ति)।३५।

'माझ्यासारखा त्रिभुवनांत कुणीच नाही कारण मी एकमेवाद्वितीय आहे. म्हणजे मलाच तिच्या पोटी विशुद्ध सत्त्वात्मक स्वेच्छामय रूपाने अवतार घेतला पाहिजे. तरच माझे वचन सत्य होईल' असा त्या निर्विकार परमेश्वराने विचार केला.३२. अशा रीतीने पुढच्या अवताराचा संकल्प करूनही त्या दत्तप्रभूंनी आपले भक्तरक्षणादि कार्य कधीही न संपणारे असल्याने तो लीलादेह टाकला नाही. तिथे श्रीपादवल्लभ अशुद्ध चित्ताच्या लोकांना अदृश्य असले तरी आपल्या भक्तांच्या कामना पूर्ण करीत आजही विद्यमान आहेत. मुंडकोपनिषदांत (२:१:२) ब्रह्माचे वर्णन शुद्ध आणि मन-प्राणानी रहित असे केले आहे. बृहदारण्यक उपनिषदांत (१:५:३) काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधीरता, लज्जा, भीती, बुद्धी ही सर्व मनाचीच रूपे सांगितली आहेत. तर मग अमनस्क परमेश्वराचा संकल्प कसा होऊं शकतो? तर परब्रह्माच्या ईक्षणासारखाच संकल्पाचाही प्रयोग निर्दोष आहे. माया त्याच्या आधीन असल्याने तो स्वतंत्रच आहे असा भाव आहे.३३.

**प्राग्वृत्तं शृण्वदृष्टेऽस्मिन्द्विजः कश्चित्कुटुम्ब्यभूत । धीमान्द्यात्स वणिग्वृत्तिः श्रीपादाङ्घ्र्यर्पितान्तरः ।।३६।।**
**व्यापारे मेऽधिलाभश्चेद्भूयात्तदनुसारतः । कुर्यां कुरुपुरे विप्र-भोजनं श्रीशतुष्टये ।।३७।।**
**इत्युक्त्वाऽगात्स्मरन्छ्रीशं व्यापारार्थं ततो धनम् । लेभे भूरि तदादाय ययौ संकल्पसिद्धये ।।३८।।**
**मार्ग एकाकिनं यान्तं तं सार्थं प्रेक्ष्य तस्कराः । सुहृत्तया तदनुगा भूत्वा तं विजनेऽहनन् ।।३९।।**

अस्मिन् अदृष्टे (सति)प्राक् वृत्तं शृणु। कश्चित् कुटुंबी द्विजः अभूत्। धी+मांद्यात् सः वणिक्+वृत्तिः श्रीपाद+अङ्घ्रि+अर्पित+अंतरः (स्यात्)।३६। मे व्यापारे अधिलाभः भूयात् चेत् तत्+अनुसारतः कुरुपुरे श्री+ईश+तुष्टये विप्र+भोजनं कुर्याम्।३७। इति उक्त्वा श्रीशं स्मरन् व्यापारार्थं अगात्। ततो भूरि धनं लेभे। तत् आदाय संकल्प+सिद्धये ययौ।३८। मार्गे एकाकिनं स+अर्थं यान्तं तं प्रेक्ष्य तस्कराः सुहृत्तया तत्+अनुगा भूत्वा तं विजने अहनन्।३९।

नामधारकास पडलेले तीन प्रश्न तो विचारीत आहे. कुरवपूरचे कार्य पूर्ण झालें नसतांना दुसऱ्या अवताराचा संकल्प कसा केला? पूर्वरूपाने राहूनही वेगळे रूप कसे धारण केले? श्रीपाद अदृश्य असूनही त्या कुरवपुरांत भक्ताच्या कामना कसे पूर्ण करतात? पुढील श्लोकापासून सिद्धमुनी याच तीन प्रश्नांची उत्तरे सांगत आहेत.३४. जगताचे मूळ असणाऱ्या परमात्म्याची कार्ये अनंत आहेत; त्यानुसार संकल्पही अनंतच होतात. श्रीपादांचे जरी कुरवपुरांत प्रत्यक्षच वास्तव्य असले तरी कलिकाळाच्या दोषाने आंधळ्या झालेल्या लोकांना ते अदृश्यासारखेच आहेत.३५. हे श्रीपादमुनी अदृश्य झाल्यानंतर एक जुनी घडलेली गोष्ट ऐक. कोणी एक ब्राह्मण गृहस्थ होता. बुद्धीच्या मंदतेमुळे तो ब्रह्मकर्म न करतां व्यापाराने चरितार्थ करीत असे. त्याच्या मनांत श्रीपादश्रीवल्लभांच्या ठायीं निस्सीम भक्ती होती.३६. मला व्यापारांत भरपूर नफा झाल्यास त्या प्रमाणांत श्रीपादवल्लभांना कुरुगड्डीत ब्राह्मणभोजनाने संतुष्ट करीन.३७. असा मनोमन नवस बोलून श्रीपादांचे स्मरण करीत तो परगांवी व्यापाराला निघाला. तेव्हां त्याला भरपूर पैसा मिळाला. तो पैसा घेऊन आपला बोललेला संकल्प पूर्ण करण्यासाठी तो कुरुगड्डीला निघाला.३८.

**तदैव सहसा तत्र श्रीपादः शूलपात्रधृक् । प्राप्य ताञ्छितधारेण त्रिशूलेन जघान सः ॥४०॥**
**एकस्तमेत्य शरणं प्रोचे चोरधिया तु नो । सङ्गीभूतोऽस्मि मां ज्ञात्वा यथेष्टं कुरु भो प्रभो ॥४१॥**
**श्रीपादोऽपि सकारुण्यां श्रुत्वोक्तिं विमलान्तरम् । ज्ञात्वा तं योजयामास तद्रक्षायै कृपार्द्रधीः ॥४२॥**
**कबन्धे तच्छिरः कृत्वा भस्माक्तं जलमन्त्रितम् । सजीवं तं द्विजं कृत्वा क्षणादन्तर्दधे स तु ॥४३॥**
**स सुप्तोत्थितवद्बुध्वा दृष्ट्वा चोरान्मृतान् द्विजः । हतशेषमुखात्सर्वं श्रुत्वा खिन्नान्तरोऽभवत् ॥४४॥**

तदा एव शूल+पात्र+धृक् श्रीपादः सहसा तत्र प्राप्य सः तान् शित+धारेण त्रिशूलेन जघान।४०। एकः तं शरणं एत्य प्रोचे। 'भो प्रभो, (अहं) तु चोर+धिया नो संगीभूतः अस्मि। मां ज्ञात्वा यथा+इष्टं कुरु'।४१। कृपा+आर्द्र+धीः श्रीपादः अपि सकारुण्यां उक्तिं श्रुत्वा तं विमल+अंतरं ज्ञात्वा तं तत्+रक्षायै योजयामास।४२। तत् शिरः कबंधे भस्म+आक्तं जल+मंत्रितम् कृत्वा तं द्विजं सजीवं कृत्वा स तु क्षणात् अन्तर्दधे।४३। स द्विजः सुप्त+उत्थितवत् बुद्ध्वा मृतान् चोरान् दृष्ट्वा हत+शेष+मुखात् सर्वं श्रुत्वा खिन्न+अंतरः अभूत्।४४।

त्या वाटेने त्याला पैसे घेऊन एकट्यानेच जातांना चोरांनी पाहिले आणि त्याच्याशी मित्रत्वाचे नाटक करून त्याला जंगलांत निर्जन ठिकाणी मारून टाकले.३९. त्याच वेळी शूल आणि कमंडलु धारण केलेले श्रीपाद एकाएकी तिथे आले आणि त्या चोरांना त्यांनी आपल्या तीक्ष्ण त्रिशूलाने ठार मारले.४०. त्यांच्यापैकीं एकजण श्रीपादांना शरण येऊन म्हणाला, 'महाराज! मी हे चोर असल्याचे न जाणतां यांच्याबरोबर आलो. आपण (हे) ओळखून आपल्याला वाटेल त्याप्रमाणे करा.'४१. दयेने ओथंबलेल्या अंतःकरणाच्या श्रीपादांनी ही काकुळतीची विनवणी ऐकून आणि त्याचे मन निष्कपट असल्याचे जाणून त्या ब्राह्मणाच्या रक्षणासाठी त्याची योजना केली.४२. त्या ब्राह्मणाचे डोके धडाला जोडून भस्मयुक्त मंतरलेल्या पाण्याने त्याला जिवंत केले आणि ते श्रीपाद क्षणार्धांत गुप्त झाले.४३. तो ब्राह्मण झोंपेतून जागावे तसा उठला. तेव्हां मरून पडलेले चोर त्याला दिसले. त्यांच्यापैकी उरलेल्याच्या तोंडून त्याने सर्व हकीकत ऐकली आणि तो खिन्नचित्त झाला.४४.

**कृत्वा तु मत्कृते कृच्छ्रं जातोऽयं चोरगोचरः । सर्वदाऽऽराधितो दैवान्नायं मे दृष्टिगोचरः ।।४५।।**
**इत्युक्त्वा धनमादाय गत्वा कुरुपुरं द्विजः । चतुःसहस्रसद्विप्र-भोजनं श्रद्धया व्यधात् ।।४६।।**
**ततः श्रीशप्रसादात्स सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । इत्याद्या भूरिशो वृत्ताः सत्यदृश्येऽपि तत्कथाः ।।४७।।**
**प्रत्यक्षस्तु सतां तत्र कच्चराणां त्वगोचरः । सोऽप्यन्यत्रावतीर्यात्र स्वरूपेणेष्टकामदः ।।४८।।**

'मत्कृते कृच्छ्रं कृत्वा तु अयं चोर+गोचरः जातः। सर्वदा आराधितः अयं दैवात् मे दृष्टि+गोचरः न'।४५। इति उक्त्वा द्विजः धनं आदाय कुरुपुरं गत्वा श्रद्धया चतुः+सहस्र+सत्+विप्र+भोजनं व्यधात्।४६। ततः सः द्विजः श्रीश+प्रसादात् उभयीं सिद्धिं प्राप। अदृश्ये सति अपि इत्याद्या तत्+कथाः भूरिशः वृत्ताः।४७। सः सतां तत्र प्रत्यक्षः, कच्चराणां तु अगोचरः (सन्) अन्यत्र अवतीर्य अपि अत्र स्वरूपेण इष्ट+कामदः।४८।

तो म्हणाला, 'ह्या श्रीपादांनी माझ्यासाठी एवढे कष्ट केले. पण चोरांना दर्शन देऊनही, सर्वदा त्यांची आराधना करणाऱ्या मला मात्र त्यानी दर्शन दिले नाही!'४५. असा खेद व्यक्त करून तो आपले धन घेऊन कुरुगड्डीला गेला. तिथे त्याने भक्तिभावाने चार हजार उत्तम ब्राह्मणांना भोजन घातले.४६. नंतर त्या ब्राह्मणाचे श्रीपादवल्लभांच्या प्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक कल्याण झाले. श्रीपादगुरू अदृश्य झाल्यानंतरही अशा कित्येक घटना घडल्या आहेत.४७. त्या श्रीगुरूंचा पापी लोकांना अनुभव येत नसला तरी साधूंना मात्र ते प्रत्यक्षच आहेत. दुसऱ्या ठिकाणी अवतरूनही इथे आपल्या पूर्वरूपाने ते भक्तांच्या कामना पुरवीत असतात.४८.

**वेदयज्ञतपोदान-प्रदिष्टफलतोऽधिकम् । श्रीपादाधिष्ठितस्थान-वासिनां द्राक्फलं लभेत् ।।४९।।**
**यत्र कुत्रापि ये केचिच्छ्रीपादाङ्घ्रिसरोरुहे । संस्मरन्त्यपि तेभ्यः स कामानिष्टान्ददात्यलम् ।।५०।।**

**।।इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीपादमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः।।७।।**

वेद+यज्ञ+तपः+दान+प्रदिष्ट+फलतो श्रीपाद+अधिष्ठित+स्थान+वासिनां अधिकं फलं लभेत्।४९। यत्र कुत्र अपि ये केचित् श्रीपाद+अंघ्रि+सरोरुहे संस्मरन्ति अपि तेभ्यः सः इष्टान् कामान् अलं ददाति।५०।

वेदांच्या अध्ययनादिकांनी, यज्ञादींच्या अनुष्ठानाने, शरीरशोषणादि तपांनी, सत्पात्री केलेल्या दानाने मिळणाऱ्या फळापेक्षांही अधिक - म्हणजे मोक्षरूपी फळ, श्रीपादगुरूंनी पावन केलेल्या त्या कृष्णतीरींच्या स्थानांत राहणाऱ्यांना शीघ्र मिळते. जीवाचा देहाशी संबंध असतो त्याहून श्रीपादरूपाने अवतरलेल्या ईश्वराचा संबंध वेगळा आहे. जीव अविद्येच्या योगाने मिथ्याभूत षड्विकारयुक्त देहाशी ममत्वाने बद्ध होतो. याउलट नित्य, मुक्त, शुद्ध, मुक्त आणि सत्य स्वभावाचा भगवंत आपल्या योगमायेने चैतन्यघन असा लीलाविग्रह धारण करतो. साहजिकच त्याचे अधिष्ठान झालेल्या पुण्यक्षेत्रांतल्या निवासाने अनायासच त्याच्या प्रियतम भक्तांचा संग लाभतो. बहुशः भगवद्भक्त भगवंतांचे अधिष्ठानभूत अशा पुण्यक्षेत्रांतच राहतात. त्यामुळे तिथे राहणाऱ्यांना भगवद्गुणांचे श्रवण आणि कीर्तनही घडते. इतर ठिकाणी विघ्नबाहुल्याने न होणारे ध्यानसुद्धां साक्षात् श्रीपादांच्या निवासाने विघ्नरहित होते. अशा रीतीने ध्यानयोग सिद्ध झाला की विनासायास मोक्ष लाभतो. केवळ ज्ञानानेच होणारा मोक्ष, ईश्वराच्या कृपेने ज्ञानाची साधने अनुकूल झाल्याने विनाप्रतिबंध ज्ञानलाभ या क्षेत्रांतून होतो असा भावार्थ आहे.४९. इतरही कोणत्याही स्थानी जे कुणी श्रीपादांच्या चरणकमलांचे स्मरणसुद्धां करतात त्यांचेही ईप्सित मनोरथ ते शीघ्र पुरवितात.५०.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा सातवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# अष्टमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। अथ अष्टमोऽध्यायः।**

**आठव्या अध्यायी थोर। कथिला नरहरी अवतार। दाउनी बाललीला विचित्र। घेई संन्यासाश्रम पवित्र।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**ब्रह्मन् कुत्रावऽतीर्यासौ किं चकारास्य चेष्टितम् । मायाश्रितस्याप्रमेयं ब्रूहि शुश्रूषवेऽर्थदम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच।।**

**उदग्देशेऽवतीर्णस्य दीनानुद्धर्तुमीशितुः । वक्ष्येऽल्पकं साधुयोगि-दुर्विभाव्यं हि चेष्टितम् ।।२।।**
**या श्रीपादोपदेशेन प्रदोषेऽजमतोषयत् । सा प्रेत्योत्तरदेशे स्त्रीर्जाता ब्रह्मकुलेऽमले ।।३।।**

नामधारक उवाच, (हे) ब्रह्मन्, असौ कुत्र अवतीर्य किं चकार? अस्य माया+आश्रितस्य अप्रमेयं अर्थदं चेष्टितं शुश्रूषवे (मे) ब्रूहि।१। दीनान् उद्धर्तुं उदक् देशे अवतीर्णस्य ईशस्य चेष्टितं अहं अल्पकं वक्ष्ये। (तत्) हि साधु+योगि+दुर्विभाव्यं (अस्ति)।२। या (ब्राह्मणी) श्रीपाद+उपदेशेन प्रदोषे अजं अतोषयत्, सा प्रेत्य उत्तर+देशे अमले ब्रह्म+कुले स्त्रीः जाता।३।

श्रीगुरू भगवंतांच्या दुसऱ्या अवताराविषयी नामधारक प्रश्न करीत आहे. हे द्विजश्रेष्ठा, त्या भगवंतांनी कुठे अवतार घेतला आणि काय लीला केल्या? स्वेच्छेने मायेचा अंगीकार केलेल्या श्रीगुरूंच्या अचिंत्य पण अभीष्टार्थप्रद अशा चरित्राचे श्रवण करण्यास अत्सुक अशा मला आपण सांगा.१. सिद्धमुनी सूत्ररूपाने सांगतात, दीनजनांचा उद्धार करण्यासाठी उत्तरेच्या देशांत (वऱ्हाडांतील कारंजा येथे) अवतरलेल्या प्रभूंचे चरित्र मी किंचिन्मात्र सांगतो; कारण खरोखर त्यांच्या लीला साधूंना आणि योग्यांनासुद्धा आकळण्यास कठीण आहेत.२. (सातव्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे) ज्या ब्राह्मणीने श्रीपादश्रीवल्लभांच्या उपदेशानुसार प्रदोषकाली शिवाची आराधना करून प्रसन्न केले, ती मृत्यू पावल्यानंतर उत्तरेच्या (वऱ्हाड) प्रांतात (कारंजा गांवांत) पवित्र अशा (वैदिक) ब्राह्मण कुळांत स्त्री म्हणून जन्माला आली.३.

**धीरूपशीललक्ष्माढ्या सुसंस्कारा गुणान्विता । श्रीपादेन पुराम्बेति प्रोक्तत्वात्सा तदाह्वया ।।४।।**
**शिववृत्तिं माधवाख्यमनुरूपं द्विजं पिता । दृष्ट्वा तत्रैव तां तस्मै गृह्योक्तविधिना ददौ ।।५।।**
**सा पातिव्रत्यमास्थाय भेजे छायेव तं पतिम् । प्रदोषेऽपि शिवं पूर्व-संस्कारात् पत्यनुज्ञया ।।६।।**
**स्नेहोऽन्योन्याश्रयो भाव-बन्धोऽभूच्चक्रवाकवत् । तयोर्हर्षितयोरेवं गर्भमम्बा वरं दधौ ।।७।।**

(सा) धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्या सुसंस्कारा गुण+अन्विता अभूत्। पुरा श्रीपादेन अम्बा इति प्रोक्तत्वात् तत् आह्वया (प्रसिद्धा अभूत्)।४। पिता तत्र एव शिव+वृत्तिं अनुरूपं माधव+आख्यं द्विजं दृष्ट्वा तां तस्मै गृह्य+उक्त+विधिना ददौ।५। सा तं पतिं पातिव्रत्यं आस्थाय छाया+इव भेजे। पूर्वसंस्कारात् पति+अनुज्ञया शिवं अपि प्रदोषे (भेजे)।६। तयोः चक्रवाकवत् अन्यः+अन्य+आश्रयः स्नेहः भावबन्धः अभूत्। एवं हर्षितयोः तयोः अम्बा वरं गर्भं दधौ।७।

ती सारासारविवेक करणारी बुद्धी, सुंदर रूप, उत्तम स्वभाव आणि सुलक्षणांनी युक्त होती. तिचे संस्कारही चांगलेच होते आणि ती शांती आदि गुणानी मंडित होती. पूर्वजन्मी श्रीपादमुनींनी 'अम्बा' असे संबोधल्याने ह्या जन्मांतही ती त्याच नांवाने ओळखली जाऊं लागली.४. तिथे - कारंजालाच तिच्या वडिलांनी एक तिला अनुरूप असा शिवभक्त, माधव नांवाचा ब्राह्मण पाहून आपल्या या कन्येचे त्याला यथाविधी दान केले.५. त्या अंबेने पातिव्रत्य धर्माला अनुसरून आपल्या पतीची सावलीसारखी सेवा केली. तसेच पूर्वजन्मांतील संस्काराच्या प्रभावाने पतीच्या आज्ञेने प्रदोषकाळांत शंकराची पूजाही करूं लागली. (स्त्रियांनी आपल्या मर्जीने कोणतेच व्रतवैकल्यादि करूं नयेत; पतीच्या आज्ञनेच करावेत असे शास्त्रशासन आहे.)६.

**धर्मानुकूल कामसुख अनिंद्य आहे.** त्या पतिपत्नींत एकमेकांवर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणे प्रेम जडले आणि त्या भावबंधांत ते दृढ बांधले गेले. त्यांच्या वैवाहिक सुखाची परिणती अंबेने श्रेष्ठ असा गर्भ धारण करण्यांत झाली. स्त्रीपुरुषांच्या एक-दुसऱ्याच्या अवयवांच्या संयोगांतून निर्माण होणारा रतिरूप आनंद वेदांनीच प्रतिपादलेला आहे. '(जीवात्मा) आपल्या प्रज्ञेने उपस्थाच्या माध्यमांतून कामसुख आणि प्रजोत्पादन प्राप्त करून घेतो.' (कौषीतकी उ.३:६); तसेच तैत्तिरीय उपनिषदांतही 'प्रजाजनन आणि रतिक्रीडा यांना उपस्थजन्य

**सा सुदोहदलक्ष्माथ तत्त्वज्ञानमुपादिशत् । द्विजोप्यनुक्रमाच्चक्रे क्रियाः पुंसवनादिकाः ।।८।।**
**अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्व-प्रव्रज्यके सुसमयेऽथ समोष्णशीते ।**
**आत्मीयवाच्यपठनेन सतोऽनुगृह्णन्नोङ्कारवाच्यभगवान्स्वयमाविरासीत् ।।९।।**

अथ सुदोहद+लक्ष्मा सा तत्त्वज्ञानम् उपादिशत्। द्विजः अपि पुंसवनादिका क्रियाः अनुक्रमात् चक्रे।८। अ+ब्रध्न(अस्त)+ग+इष्ट+खग+सूचित+सिद्धि+पूर्व+प्रव्रज्यके सम+उष्ण+शीते सुसमये, आत्मीय+वाच्य+पठनेन सतोः अनुगृह्णन् कार+वाच्य भगवान् स्वयं आविरासीत्।९।

आनंद' अशा शब्दांत रतिसुखाला ब्रह्मानंदाचे स्वरूप मानले आहे. भगवद्गीतेनेही धर्माच्या अनुकूल कामाची भगवद् विभूतीत गणना केली आहे. अर्थातच हा काम निंद्य नाही. दधौ या शब्दांतून यथाविधी गर्भाधान या मंत्रोक्त विधीचा संकेत दिला आहे. ही सर्व भक्तपराधीन भगवंताची लीलाच होय.७.

यथाकाल तिला (अंबेला) उत्तम डोहाळे लागले. येणाऱ्या लोकांना ती तत्त्वज्ञानाचा उपदेश करूं लागली. माधवभटजींनीही क्रमशः तिसऱ्या महिन्यांत पुंसवन, अनवलोभन, चौथ्या महिन्यांत सीमंतोन्नयन (आश्वलायन गृह्यसूत्रानुसार) हे संस्कार पार पाडले. पारस्कर गृह्यसूत्रांत सीमंत सहाव्या वा आठव्या महिन्यांत सांगितले आहेत.८. ऋग्वेदाच्या *'दशमे मासि जायत'* या मंत्रानुसार दहाव्या महिन्यांत अंबा प्रसूत झाली. त्या वेळी कोणत्याही ग्रहाचा अस्त नव्हता. (**अब्रघ्नग** = अनस्तंगत) सर्व ग्रह अनुकूल होते आणि सिद्धिपूर्वक संन्यासाचा संकेत देणाऱ्या **प्रव्रज्या** नांवाच्या योगाने युक्त अशा शुभ मुहूर्तावर उष्णता आणि शीत यांचे साम्य असतांना भगवान् स्वतः, आपला वाचक जो प्रणव (ॐकार) त्याचा उच्चार करीत, कलीने त्रस्त असलेल्या साधुजनांवर अनुग्रह करण्यासाठी अवतरले. पतंजलींनी प्रणवाला ईश्वराचा वाचक असे म्हटले आहे (१:२७). कठोपनिषदानुसार (१:२:१७) ॐकार हेच परब्रह्माचे परमश्रेष्ठ आलंबन आहे. ह्या आलंबनाला जाणणारा जे इच्छील ते पावतो.

**विश्वं तदाभूच्छुभशंसि लोका ॐकारमाकर्ण्य सुविस्मिताः स्युः ।**
**भावान्सुखेटान्गणकाः सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुरदृष्टपूर्वान् ।।१०।।**

तदा विश्वं शुभ+शंसि अभूत्। लोकाः ॐकारं आकर्ण्य सुविस्मिताः स्युः। गणकाः अदृष्टपूर्वान् भावान् सुखेटान्, सुयोगान् दृष्ट्वा मुदं प्रापुः।१०।

ॐकार हे परात्परब्रह्मच असल्याने, तसेच ब्रह्माचे प्रतीक असल्याने आणि ब्रह्मप्राप्तीच्या सर्व उपायांत श्रेष्ठतम आलंबन (ध्येय) असल्याने भगवंत ॐकारवाच्य आहे. जशी एखादी व्यक्ती आपल्याला प्रिय अशा नांवाने हांक मारल्यानंतर आनंदित होते आणि जवळ येते तसाच परमात्माही आपल्याला प्रिय अशा ॐकाराच्या उच्चाराने प्रसन्न होऊन भक्ताकडे येतो.

**भगवदावतार.** भगवान स्वेच्छेने अवतरले (**स्वयं आविरासीत्**) म्हणजे आपल्यासारखे कर्मरूपी पारतंत्र्याने, शुभाशुभ कर्मानुसार भौतिक देह धारण करून जन्मले नाहीत. तर श्रीकृष्णादि अवतारांच्या वेळी जसे ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य, तेज आदि ईश्वरी गुणांनी नित्य संपन्न, आपल्या त्रिगुणात्मकी वैष्णवी मायेला वश करून, जन्मादि विकारांनी अस्पृष्ट, अव्यय असा सर्वभूतमहेश्वर असूनसुद्धां, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावानेच आपल्याच मायेने देहधाऱ्यासारखा जन्मल्याचे नाटक करीत, लोकांवर अनुग्रह करण्यासाठी प्रकट झाले. तसेच या वेळी पण आपले असे कांही प्रयोजन नसतांनाही केवळ लोकोद्धारासाठीच, वैदिक धर्माचा उपदेश करण्यासाठीच नरसिंहसरस्वतीरूपाने प्रकटले. राम आणि कृष्ण यांच्या अवताराच्या वेळी जसे त्यांनी आपल्या दिव्य जन्माची सूचना देण्यासाठी आपला अलंकार, चिह्ने आणि आयुधे धारण केलेला सोळा वर्षांचा देह प्रकट केला त्याचप्रमाणे यावेळीही जन्मानंतर रडण्याऐवजी जन्मतःच ॐकाराचा पाठ केला.९.

त्या जन्मकाळी, अग्नी, वायू इत्यादि सर्व विश्व शुभाचे संकेत देत असल्याचे जाणवले. उपस्थित लोक बालकाचे ॐकारपठण ऐकून आश्चर्यचकित झाले. ज्योतिषांना बाळाच्या कुंडलीतील पूर्वी न पाहिलेले शुभ ग्रह, तनु आदि भाव आणि प्रव्रज्यादि योग पाहून परम हर्ष झाला.१०.

त ऊचुर्माधवेदं ते सुकृतद्रुफलं किल । श्रीसिद्धयोऽस्य दास्योऽङ्घ्री स्पर्शवन्निधयोऽनुगाः ।।११।।
नायं गृही जनोद्धर्ता दृष्ट्या पतितपावनः । वन्द्योऽस्यानुग्रहात्कोऽपि भवेन्नैवात्र संशयः ।।१२।।
इत्युक्त्वा तेन हृष्टेन पूजितास्ते गृहं ययुः । श्रुत्वाद्भुतं जनुर्द्रष्टुं प्राप्तैर्लोकैः स नेक्षितः ।।१३।।
तद्दृग्दोषभियैकान्ते गुरुः संस्थाप्य रक्षया । तं ररक्षार्भबुद्ध्येशं तन्मायामोहितो हरिम् ।।१४।।
भूयान्नरो हरिरिव नरतापाघदैन्यहृत् । अयमित्याख्यया चक्रे बालं नरहरिं द्विजः।।१५।।

ते ऊचुः, '(हे) माधव इदं किल ते सुकृत+द्रु+फलम्। अस्य श्री+सिद्धयोः दास्यः, अङ्घ्री स्पर्शवत्, निधयः अनुगाः (सन्ति)।११। अयं गृही न (अस्ति)। जन+उद्धर्ता, दृष्ट्या पतित पावनः अस्ति। अस्य अनुग्रहात् कः अपि वन्द्यः भवेत्। अत्र न एव संशयः।'१२। इति उक्त्वा हृष्टेन तेन पूजिताः ते (गणकाः) गृहं ययुः। (इदं) अद्भुतं जनुं श्रुत्वा द्रष्टुं प्राप्तैः लोकैः स न ईक्षितः।१३। तत्+माया+मोहितः गुरुः तत्+दृक्+दोष+भिया तं हरिं अर्भ+बुद्ध्या रक्षया संस्थाप्य ररक्ष।१४। अयं नरः हरिः इव नर+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात् इति (हेतोः) बालं आख्यया नरहरिं चक्रे।१५।

ते ज्योतिषी माधवाला म्हणाले, अरे माधवा, हा बालक म्हणजे खरोखर तुझ्या पुण्यवृक्षाचे फळच आहे! साक्षात् लक्ष्मी आणि सर्व सिद्धी याच्या दासी आहेत. याचे पाय परीसच आहेत. नऊ निधि यांचे अनुचर आहेत.११. हा गृहस्थ होणार नाही. लोकांचा उद्धारकर्ता होईल. आपल्या दृष्टीनेच पतितांनाही पावन करील. आपल्या अनुग्रहाने हा कुणालाही पूज्यता प्राप्त करून देईल याविषयी मुळीच संशय नाही.'१२. असे जातक ऐकून आनंदित झालेल्या माधवाने त्या ज्योतिष्यांची यथायोग्य संभावना केली आणि ते आपापल्या घरी निघून गेले. ह्या नवलाईच्या जन्माचे वृत्त ऐकून त्या बाळाला पाहायला आलेल्या लोकांना मात्र त्याला पाहतां आले नाही.१३. त्या हरीच्या मायेने मोहित झालेल्या पित्याने त्याला सामान्य बालकच समजून त्या लोकांची दृष्ट लागेल या भीतीने त्याला अंगारा लावून घरांत सुरक्षित ठेवून दिले.१४. हा मानवी बालक श्रीहरीसारखा लोकांचे ताप, पाप आणि दैन्य दूर करणारा होवो (होईल) अशा हेतूने त्याचे नांव नरहरी असे ठेवण्यांत आले.१५.

**क्षुच्छान्तिर्नास्य मत्तोऽतो धात्री वाजा पयस्विनी । मृग्येत्युक्तेऽम्बयोरोजौ स्पृष्ट्वार्भोऽध्यदुहत्पयः ।।१६।।**
**तद्बालचेष्टितं चित्रं सद्दृग्दोषभियानया । स्फुटं नाकारि मात्रैवमन्यदप्यद्भुतास्पदम् ।।१७।।**
**बाल्यादिना मर्त्यलिङ्ग-भाजीहाज्ञानलक्ष्मणाम् । प्रतीतेर्ब्रह्मतारोपः साक्षात्कैः कल्प्यते कथम् ।।१८।।**
**जातस्त्रैवार्षिकोऽप्येष लीलयाभूत्सुमूकवत् । खिन्नाऽतस्तत्प्रतीकारानारेभेऽम्बा द्विजोदितान् ।।१९।।**
**सौर्येऽह्न्यश्वत्थपत्रेऽन्न-भोजनैः कुलपार्चनैः । बालोक्तिपाठनैश्चान्यैः सूपायैर्नावदच्छिशुः ।।२०।।**

अस्य क्षुत्+शांतिः मत्तो न भवति अतो धात्री वा पयस्विनी अजा मृग्या इति अम्बया उक्ते उरोजौ स्पृष्ट्वा पयः अधि+अदुहत्।१६। तत् चित्रं बाल+चेष्टितं अनया मात्रा सत्+दृक्+दोष+भिया स्फुटं न+अकारि। एवं अन्यत् अपि अद्भुतास्पदं (स्फुटं न अकारि)।१७। इह मर्त्य+लिङ्ग+भाजि बाल्यादिना अज्ञान+लक्ष्मणाम् प्रतीतेः साक्षात् ब्रह्मता+आरोपः कैः कथं कल्प्यते?।१८। एषः त्रैवार्षिकः जाता अपि लीलया सु+मूक+वत् अभूत्। ततः खिन्ना अम्बा द्विज+उदितान् तत्+प्रतीकारान् आरेभे।१९। सौर्ये अह्नि अश्वत्थ+पत्रे अन्न+भोजनैः, कुल+प+अर्चनैः, बाल+उक्ति+पाठनैः, अन्यैः च सु+उपायैः शिशुः न अवदत्।२०।

'ह्या बाळाची भूक (माझे दूध कमी पडल्याने) माझ्याकडून शमत नाही. याच्यासाठी एखादी दुधाची आई किंवा एखादी दुभती शेळी शोधावी.' असे आपल्या आईचे बोलणे ऐकून त्या बाळाने आपल्या हातांनी तिच्या स्तनांना स्पर्श केला. त्याबरोबर तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा वाहूं लागल्या.१६. त्या लेकराने केलेला तो चमत्कार त्या मातेने साधूंचीही दृष्ट लागेल अशा भीतीने प्रकट केला नाही. त्या बाळाचे तसेच आणखीही चमत्कार तिने उघड केले नाहीत. यावरून भगवंताच्या लीला अनंत आहेत हेच सूचित केले आहे.१७. या भूलोकावर अवतरून बाल्य आदि मानवरूपाची चिह्ने धारण केलेल्या बाळाच्या अज्ञानाच्या लक्षणांचा प्रत्यय येत असतांना त्याच्याविषयी हा साक्षात् परब्रह्म आहे अशी कल्पना कुणाला कशी येऊं शकेल?१८. हा मुलगा तीन वर्षाचा होऊनही स्वेच्छेने कांहीही न बोलतां अगदी मुक्यासारखा झाला. त्यामुळे खिन्न झालेल्या आईने ब्राह्मणांना विचारून त्यावर उपाय सुरूं केले.१९. शनिवारी (किंवा रविवारी; **सौरि**=शनि; सूर्य=रवि) पिंपळाच्या पानांत अन्न वाढून जेवविण्याने, कुलस्वामीच्या पूजनाने, त्याच्याबरोबर बोबडे बोल बोलून शिकवल्याने आणि ब्राह्मीवचाचे सेवन आदि अशाच दुसऱ्या प्रभावी उपायांनीसुद्धां तो शिशु कांही बोललाच नाही.२०.

**वक्तुं श्रोतुं नायमज्ञो मूकश्चेत्कथमोङ्कृतिम् । श्रुत्वान्योक्तिं ब्रूत इति पितरौ मोहमापतुः ॥२१॥**
**मूकोऽयं नौ श्रमेणालं प्रदोषे शम्भुरर्चितः । दिष्ट्यैतत्फलं प्राप्तं संस्कार्योऽसौ कथं न्वतः ॥२२॥**
**ताभ्यामित्युदिते मौञ्ज्यां बद्धायां वक्ष्य इत्यसौ । संज्ञया दर्शयत्स्वर्णं व्यकृणोत्तन्मुदेऽयसः ॥२३॥**
**तदा सञ्जातविश्वासो विप्रानाहूय माधवः । मुदा संभृतसंभारः सुलग्नेऽमुमुपानयत् ॥२४॥**

अयम् वक्तुं श्रोतुं च न अज्ञः। मूक इति चेत् अन्य+उक्तिं श्रुत्वा कथं ॐ कृतिं ब्रूते? इति पितरौ मोहं आपतुः।२१। अयं मूकः (अस्ति)। नौ श्रमेण अलम्। प्रदोषे शम्भुः अर्चितः तत् एतत् दिष्ट्या फलं प्राप्तम्। नु अतः असौ कथं न संस्कार्यः?।२२। ताभ्यां इति उदिते असौ मौञ्जायां बद्धायां वक्ष्ये इति संज्ञया दर्शयत्। तत्+मुदे अयसः स्वर्णं व्यकृणोत्।२३। तदा सञ्जात+विश्वासः माधवः मुदा संभृत+संभारः विप्रान् आहूय सुलग्ने अमुम् उपानयत्।२४।

याला ऐकायला किंवा बोलायला येत नाही असे नाही. मुका म्हणावा तर इतरांचे बालणे ऐकून हा 'ॐ' असे उत्तर कसे देतो? असा त्याच्या मातापित्यांना संभ्रम पडला.२१. ते म्हणाले, 'इतके उपाय करूनही हा कांहीच बोलत नाही त्या अर्थीं हा मुकाच असावा. प्रदोषकाळी शंकराची पूजा केल्याचे हे चांगले पुत्ररूप फळ आम्हांला मिळाले! तो दुर्दैवाने मुका मिघाला. तरी आतां त्याच्यावर मौंजीबंधनादि संस्कार न करून कसे चालेल?'२२. आपल्या आईवडिलांचे हे संभाषण ऐकून ह्या मुलाने त्यांना खुणेने दाखविले कीं, 'मी मौञ्जीबंधनानंतर बोलेन.' त्यांची खात्री पटविण्यासाठी त्यानें आपल्या हस्तस्पर्शानेच परीसाप्रमाणे लोखंडाचे सोने करून दाखविले. विधिवत् संस्कारून स्वस्तिवाचन केल्यावर बटूने मातृभोजन केले. २३. त्या वेळी माधवाचा विश्वास बसला आणि त्याने आनंदाने सर्व सामग्री जमवून शुभ मुहूर्तावर ब्राह्मणांना बोलावून ह्या आपल्या पुत्राची मुंज लावली. मुंज अर्थात् उपनयन म्हणजे आचार्यांजवळ नेणे हे अंगभूत असलेले आणि गायत्रीचा उपदेश प्रधान असलेले विशेष कर्म. उपनयन हे पद योगरूढ आहे. २४.

**सुसंस्कृतः कृतस्वस्त्ययनो भुक्तोऽम्बया सह । गुरूपदिष्टां सावित्रीमुपनीतोऽयमाददे ॥२५॥**
**गुर्वाश्रितब्रह्मचारि-धर्मो भिक्षां स मातरम । याचयित्वा जगौ वेदान्न चित्रं वेदवाच्यदः ॥२६॥**
**प्रणम्य पितरौ प्राह विरक्तः प्रव्रजामि भोः । अनित्याद्द्राक्शरीरस्य तदाज्ञां दातुमर्हथः ॥२७॥**

सु+संस्कृतः कृत+स्वस्ति+अयनः अम्बया सह भुक्तः उपनीतः गुरु+उपदिष्टां सावित्रीं आददे।२५। गुरु+आश्रित+ब्रह्मचारि+धर्मः सः मातरम् भिक्षां याचयित्वा वेदान् जगौ। (इदं) न चित्रं, अदः वेदवाचि।२६। पितरो प्रणम्य (सः) प्राह भोः! अहं विरक्तः शरीरस्य अनित्यत्वात् द्राक् प्रव्रजामि। तत् (युवां) आज्ञां दातुं अर्हथः।२७।

त्यानंतर मुंज लावून - द्वितीय जन्माचे द्योतक असलेली वस्त्र आणि जानवे घालून, गुरूंजवळ जाऊन त्यांनी कानांत उपदेशिलेला उपदेशः - अर्धा-अर्धा आणि संपूर्ण गायत्री मंत्र स्वीकारून उच्चारला.२५. 'तूं आतां ब्रह्मचारी आहेस, दिवसां न झोपतां आचार्यांच्या अधीन राहून वेदांचे अध्ययन करावे, सकाळ-संध्याकाळ भिक्षा मागावी, सकाळ-संध्याकाळ समिधा आणाव्यात' (आश्वलायन गृह्यसूत्र १:२२:२-५) इत्यादि ब्रह्मचारी धर्माचे गुरूंकडून श्रवण करून, आईजवळ त्याप्रमाणे भिक्षा मागितली आणि ऋक्, यजुः आणि साम या तीनही वेदांचे पठण केले. ऋग्वेदी ब्राह्मणांत वेदांचे प्रथम उपाकरण (वेदाध्ययनाचा आरंभ) उत्तरायणांत करण्याचा नियम असतो, तसा श्रीगुरूंनी अवतार घेतलेल्या वाजिसनेयि शाखेत नसतो. त्यामुळे उपनयनानंतर लगेच वेदपठण करणे योग्यच होय. नुकतीच मुंज झालेल्या, कसलाही अभ्यास न केलेल्या त्या बटूने वेदपठण केले यांत कांही आश्चर्य मानण्याचे कारणही नाही. कारण सर्व वेद ज्यांची निःश्वसिते आहेत अशा महद्भूताचा अवतार ते आहेत (बृहदारण्यक उपनिषद २:४:१०).२६. नंतर त्या बटूने माता-पित्यांना वंदन केले आणि म्हणाले, 'मी विरक्त आहे. शरीर अनित्य आहे. त्याचा क्षणाचाही भरंवसा नाही. ते पडण्यापूर्वीच ज्ञान झाले तरच मोक्ष मिळतो. अन्यथा कठोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (२:३:४) पुनश्च जन्म घ्यावा लागतो. त्यासाठी मी लगेच शास्त्राच्या आज्ञेनुसार श्रवणादींच्या अनुष्ठानासाठी संन्यास घेत आहे. तरी आपण मला आज्ञा द्यावी.'२७.

**प्रत्यवायाभिक्रमान्तो नैव धीमति धीस्त्वियम । मम प्राग्दैहिकाक्षय्या भविष्यन्त्यात्मजा हि वाम् ।।२८।।**
**इत्युक्तेऽम्बा विषीदन्ती तन्मायामोहिताऽब्रवीत् । एक एव सुतस्त्वं मे कथं यासि विहाय माम ।।२९।।**
**प्रव्रजेद्वेदविद्भुक्त-गार्हस्थ्योऽनुक्रमाद्वनात् । तत्त्वविद्वासनानाश-मनोभङ्गा अतः श्रुताः ।।३०।।**

धीमति प्रत्यवाय+अभिक्रम+अन्तौ न एव। इयं मम धीः प्राक्+दैहिका अक्षय्या। वां आत्मजा भविष्यन्ति हि।२८। इति उक्ते तत्+माया+मोहिता अम्बा विषीदन्ती अब्रवीत्। त्वं मे एक एव सुतः। मां विहाय कथं यासि?२९। वेदवित् भुक्त+गार्हस्थ्यः अनुक्रमात् वनात् प्रव्रजेत्। अतः तत्त्ववित्+वासना+नाश+ मनो+भङ्गाः श्रुताः।३०।

आपल्या गृहत्यागाच्या प्रस्तावाला आईवडिलांचा विरोध असणार याची जाणीव असलेले बाल नरहरी पुढे म्हणाले, 'ब्रह्मचर्याश्रमांत स्वाध्यायाचे अध्ययन करावे (शतपथ ब्राह्मण ११:५:३) अशी वेदांची आणि ब्राह्मणाने संपूर्ण वेदांचे सरहस्य ज्ञान करून घ्यावे शास्त्रांचीही (मनुस्मृति २:१६५) आज्ञा आहे. स्वाध्यायाचा परित्याग करून ती आज्ञा पालन न केल्याने ऋषींच्या ऋणाची फेड न केल्याचा प्रत्यवाय दोष लागेल; तसेच वैराग्याच्या अभावी हा जो संन्यासाचा अभिक्रम (आरंभ) केला आहे त्याचाही नाश होईल. (बृहदारण्यक उपनिषदाच्या भाष्यावरील वार्तिकांत १:४:१५८४ म्हटल्याप्रमाणे) कलियुगांत बहुसंख्येने आढळणाऱ्या भरकटलेल्या, भांडकुदळ, दुश्चित्त, परनिंदापर संन्याशांत भर पडेल; असे तुम्हांला वाटूं देऊं नका. कारण मी विवेकशील बुद्धीने हा निर्णय घेत आहे. ही बुद्धी माझी पूर्वजन्मार्जित आणि अक्षय आहे. मी संन्यास घेतल्यावर तुमची गती काय असें विचाराल तर तुम्हांला आणखी पुत्र होणार आहेत.'२८. असे आपल्या मुलाचे भाषण ऐकून त्याच्याच मायेने भुललेली आई दुःखाने कळवळून म्हणाली. 'अरे, तूं माझा एकुलता एक मुलगा आहेस. असा कसा मला सोडून जातोस?२९. आधी ब्रह्मचर्याश्रमांत वेदांचा अभ्यास करावा, मग गृहस्थाश्रमांतील सुखांचा उपभोग घेऊन वानप्रस्थ आश्रम घ्यावा आणि मग संन्यास घेऊन तत्त्वज्ञान, वासनाक्षय आणि मनोभंग साधावेत असाच क्रम आमच्या ऐकण्यात आहे. किंवा असाच क्रम श्रुतिसंमत आहे.'३०.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**जैह्व्यौपस्थ्यसुखाक्तानां क्रमोऽयं नैव मादृशः । प्राक्संस्कारविरक्तस्य जोष्यैः किं मेऽकयोनिभिः ।।३१।।**
**श्रुतश्रोतव्यनिर्वेदं यास्ये संन्यस्य भो ततः । संसिद्धिः सुलभा नातः परं कार्यं हि धीमता ।।३२।।**
**कलावायुः शतं स्वापाद्-ध्रियतेऽर्धं तु शेषकम् । बाल्ययौवनवृद्धत्वैः पराधीनतया च नुः ।।३३।।**

श्रीगुरुः उवाच। जैह्व्य+औपस्थ्य+सुखाक्तानां अयं क्रमः। मादृशः न एव। प्राक्+संस्कार+विरक्तस्य मे अक+योनिभिः जोष्यैः किम्?३१। भो, संन्यस्य श्रुत+श्रोतव्य+निर्वेदं यास्ये। ततः सिद्धिः सुलभा हि अतः परं धीमता न कार्यम्।३२। कलौ नुः आयुः शतम्। अर्धं स्वापात् ऩ्हियते। शेषकं (अर्धं) तु बाल्य+यौवन+वृद्धत्वैः पराधीनतया (ऩ्हियते)।३३।

यावर श्रीगुरू उत्तर देत आहेत. 'जिह्वेने मिळणारा रसास्वाद आणि लिंगाने मिळणारे कामसुख (हे सर्वच ऐंद्रिय सुखांचे उपलक्षण आहे) यांची आसक्ती असणाऱ्यांसाठी हा तूं सांगितलेला क्रम आहे. माझ्यासारख्यासाठी नाही. पूर्वसंस्कारांमुळे विरक्त असलेल्या मला या दुःखमूलक विषयांचे काय प्रयोजन? या विषयांच्या उपभोगाच्या काळांतही स्पर्धा, असूयादि उपसर्ग असतातच. विवेकशील माणसाला सगळाच संसार दुःखरूपच आहे असे पतंजलींचे सूत्र आहे (*'सर्वमेव दुःखं विवेकिनाम्।'* २:१५) म्हणून संन्यास घेऊन ज्ञात आणि अज्ञात अशा सर्व अग्राह्य विषयांपासून मन काढून मी जात आहे. निर्वेद म्हणजे दुःखबुद्धीने विषयांसंबंधी उदासीनता. अशा रीतीने संन्यास घेतल्यावर मनुष्यजन्माचे परमसाध्य जो मोक्ष तो सुलभ होतो. म्हणून शहाण्याने यापेक्षां वेगळे कांही करूं नये.३२. 'कलियुगांत माणसाची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची सांगितली आहे. त्यांतील अर्धी झोपेतच जाते. उरलेल्या अर्ध्या भागांत बालपण, यौवन आणि वार्धक्य यांच्यांत अनुक्रमे मातापिता, पत्नी आणि पुत्रपौत्र (दुहिता-दौहित्र) यांच्या अधीनतेत जाते (*'पितृमातृमयो बाल्ये यौवने वनितामयः। पुत्रपौत्रमयो वार्द्धक्ये मूढो नात्ममयः क्वचित्।।'* गरुडपुराण-प्रेतखंड-धर्मकांड १२:१९).३३.

**स्वप्नवत्सम्पदिष्टाढ्य-संसारोऽज्ञानकल्पितः । यौवनं पुष्प वच्चायुस्तडिद्वत् क्व धृतिर्बुधे ।।३४।।**
**कालो भ्रूणाञ्छिशून्यूनो वृद्धानार्तान्सुखस्थितान् । मूढान् ग्रसत्यपि प्राज्ञान्निःशेषानमरानपि ।।३५।।**
**यदर्थं ममताप्येतज्जलबुद्बुदवद्वपुः । मांसास्थिरक्तवद्धिंस्र-वञ्चनार्थं त्वगावृतम् ।।३६।।**

अज्ञानकल्पितः सम्पत्+इष्ट+आढ्य+संसारः स्वप्नवत् (अस्ति)। यौवनं पुष्पवत्; आयुः तडित्+वत्। बुधे क्व धृतिः?३४। कालः भ्रूणान्, शिशून्, यूनः, वृद्धान्, आर्तान्, सुखस्थितान्, मूढान्, प्राज्ञान् अपि निःशेषान् अमरान् अपि ग्रसति।३५। यदर्थं ममता (क्रियते) एतत् अपि वपुः जल+बुद्बुदवत्। मांस+अस्थि+रक्त+वत् हिंस्र+वंचनार्थं त्वक्+आवृतम्।३६।

अज्ञानाने भासणारा हा संपत्ती, आप्त, इष्ट इत्यादींनी युक्त असा संसार स्वप्नासारखा मिथ्या आहे. यौवन हे फुलासारखे लगेच कोमेजणारे आहे. आकाशांत चमकून जाणाऱ्या विजेसारखे हे आयुष्य क्षणभंगुर आहे. शहाण्याने यांतील कशाचा भरंवसा धरावा? हे मानवी जीवन बिनभरंवशाचे आहे असा भावार्थ.३४. इथे काळ (मृत्यू) गर्भांतल्या भ्रूणापासून सर्वांच्या मागे लागलेला आहे. बाल, तरुण, वृद्ध, दुःखी, सुखी, मूर्ख, शहाणा या सर्वांचा, अगदी देवांचाही तो ग्रास करतोच. कुणालाही सोडत नाही.३५.

**नाशिवंत देह -** ज्या देहामुळे सर्व 'माझे' वाटतात तो देहसुद्धां पाण्यावरील बुडबुड्यासारखा अशाश्वत आहे. मांस, अस्थी, रक्त अशा घृणास्पद पदार्थांचा बनलेला आणि लांडगे, कोल्हे, कावळे अशा हिंस्र प्राण्यांपासून रक्षण करण्यासाठी कातडीत गुंडाळलेला आहे. शतश्लोकींत (४) भ.पू.पा. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे बाहेरून हाडे, स्नायू, मज्जा, मांस, रक्त, चरबी आणि त्वचा यांनी घडलेला आणि आंत विष्ठा, मूत्र आणि श्लेष्म यांनी भरलेला असा हा किळसवाणा देह धारण करण्याइतके वैराग्याला प्रभावी निमित्त शोधून सांपडणार नाही.३६.

**न भस्मविट्कीटरूप-परिणामं निजानुगम् । तदानुषङ्गिकाः स्त्र्याद्याः किमुतानर्थहेतवः ।।३७।।**

भस्म+विट्+कीट+रूप+परिणामं (वपुः) न निज+अनुगम्। तत्+आनुषंगिकाः अनर्थ+हेतवाः स्त्री+आद्याः किम् उत?३७। गरुडपुराणाच्या वचनानुसार (प्रेतखंड-धर्मकांड १९:१८) मरणोत्तर ह्या शरीराचे, पुरले तर कृमी, जाळले तर भस्म आणि हिंस्र प्राणांनी खाल्ले तर विष्ठा अशा रूपांत परिवर्तन होते. हे कांही आपल्याबरोबर लोकांतरी किंवा जन्मांतरी येत नाही. गरुडपुराणांतच (प्रेतखंड-धर्मकांड १२:२४-२७) पुढे असे म्हटले आहे की जीवाने शरीर सोडल्यानंतर ते भूमीवर दगडा-लाकडासारखे अचेतन होऊन तिथेच पडते; हा जीव आपण केलेले शुभाशुभ कर्म तेवढे बरोबर घेऊन जातो. मित्र आणि भाऊबंद स्मशानापर्यंत येऊन परत जातात आणि शरीराला अग्नी जाळून टाकतो. जाणाऱ्या जीवासोबत फक्त त्याने केलेले पाप-पुण्यच जाते. ही जर देहाची कथा आहे तर देहाच्या अनुषंगाने आपले वाटणाऱ्या, अनर्थालाच कारण असणाऱ्या स्त्रीपुत्रादीविषयी बोलायलाच नको!३७.

**देह आणि जीव -** हा देह पंचभूतांचा घडलेला, विकारशील (जन्म, वाढ, अस्तित्व, परिणाम, क्षय आणि नाश हे विकार असलेला) आणि इंद्रियांना प्रतीत होणारा - म्हणजेच घटासारखा जड आहे. जीव हा गीतेच्या वचनानुसार (१५:१७) चैतन्याचा अंश आहे; अविनाशी आहे; तो आकाशासारखा सर्वव्यापी आहे; आकाश जसे घट-मठादि उपाधींनी बंदिस्त झाल्यासारखे भासते पण तसे नसते, तसाच देहादि उपाधींनी बद्ध वाटणारा जीव वस्तुतः तसा नसतो. कठोपनिषदाच्या वचनानुसार (१:२:१८) जन्मादिविकाररहित आहे. मग तो संसारांत पडून सुखदुःखांचा भोग कसा घेतो, असे कुणी म्हणेल, तर त्याचे उत्तर असे आहे की त्याचा सुखदुःखाशी जाणवणारा संबंध अज्ञानमूलक आणि स्वप्नवत् आहे. 'तु' शब्दातून छांदोग्य उपनिषदांतील (६:३:२) जीवरूपाने प्राणिमात्रांत प्रवेशून नामरूपांची अभिव्यक्ती करण्याच्या ईश्वरी संकल्पाचा संकेत आहे. आतां अशी शंका उपस्थित होते की सर्वज्ञ ईश्वर जाणूनबुजून लक्षावधी अनर्थांचे मूळ असलेल्या देहांत प्रवेश करून दुःख भोगण्याचा संकल्प कसा करील?

**देहोऽचित्सर्वगो जीवश्चिदंशोऽजोऽव्ययो ध्रुवः । स्वप्नवत्सुखदुःखादि-संबन्धोऽज्ञानजोऽस्य तु ।।३८।।**

देहः अचित्। चिदंशः जीवः अजः अव्ययः। अस्य सुख+दुःख+आदि संबंधः तु अज्ञान+जः स्वप्न+वत्।३८।

शंका बरोबर आहे. आपल्या अविकृत रूपाने अनुप्रवेश करून दुःख भोगीन असा ईश्वराचा संकल्प नाही. जीव हा बुद्धी, मन, प्राण, इंद्रिये इत्यादि उपाधींत पडलेले केवळ ईश्वराचे प्रतिबंब आहे. आरशांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासारखे. अचिंत्य अनंतशक्तिमान आत्म्याचा बुद्ध्यादिकांत होणारा फक्त आभास आहे. आत्मस्वरूपाचा विवेक न केल्याने तो सुखी, दुःखी, मूढ इत्यादि भासतो. जसे आरशांत पडलेले माणसाचे किंवा पाण्यांत पडलेले सूर्याचे प्रतिबिंब आरशावरील मळाने मळल्यासारखे वाटते, आरशावरील तड्याने फुटल्यासारखे दिसते किंवा पाण्याच्या हलण्यामुळे विकृत झालेले दिसते तसेच हे आहे. मूळ बिंब - माणूस किंवा सूर्य, यांच्यावर त्याचा कांहीच परिणाम होत नाही. कठोपनिषदाच्या (२:२:११) प्रतिपादनानुसार सर्व जगाचा नेत्र असलेला सूर्य जसा त्या जगांतील दोषांनी दूषित होत नाही त्याचप्रमाणे भूतमात्रांचा अंतर्यामी बाह्य जगतांतील दुःखांपासून अलिप्त असतो. बृहदारण्यक उपनिषदांत (१:३:७) म्हटलेच आहे की हा आत्मा चिंतन करीत असल्यासारखा किंवा हालचाल करीत असल्यासारखा दिसतो. वस्तुतः चिंतन वा हालचाल हे त्याचे गुण नसतात.

**जीवाचे सत्यत्व -** मृत्तिकेची बाहुली, मृत्तिकेचा घट, मृत्तिकेचे पात्र या सर्वांत मृत्तिका हेच सत्य आहे. घट, पात्र, बाहुली इत्यादि मृत्तिकेचेच विकार आहेत. त्या विकारांना शब्दांत व्यक्त करण्यासाठी नांवे दिलेली आहेत (छांदोग्य उपनिषद ६:१:४). त्याचप्रमाणे आत्माच सत्य आहे आणि सर्व जीव हे विकार आहेत असे मानले तर मग सगळे जीव लटकेच म्हणावे लागतील आणि इहलोक, परलोक इत्यादीसुद्धां खोटे ठरतील. हा आक्षेप बरोबर नाही; कारण आत्मा सत्य आहे आणि त्याच्या अधिष्ठानामुळे जीवादि विकारांनाही सत्यत्व येते. आत्म्याचे अधिष्ठान नसेल तर ते आपल्या ठिकाणी असत्यच आहेत. सद्रूप आत्म्यामुळे सर्व व्यवहारांना सर्व विकारांना सत्यत्व आहे. अन्यथा ते खोटेच आहेत. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांच्या छांदोग्य उपनिषदाच्या ६:३:२ या मंत्रावरील भाष्याचा आधार घेतला आहे.३८.

**प्रसादात्सद्गुरोः शाब्द-परब्रह्मविदस्त्विदम् । छित्त्वाऽविद्गहनं ज्ञेय-ज्ञानास्त्रः स्वस्थ इद्भवेत् ।।३९।।**
**य उत्तमं ज्ञानपात्रं लब्ध्वा धामाग्रजातिजम् । नाचरत्यात्मनः श्रेयस्तेनात्मा वञ्चितो ध्रुवम् ।।४०।।**
**तस्मान्नारब्धविध्ना मे भव तेऽम्ब नमोऽपि ते । पुत्रो भविष्यति ध्यानाद् भवाब्धिं मे तरिष्यसि ।।४१।।**

शाब्द+परब्रह्म+विदः सद्गुरोः प्रसादात् ज्ञेय+ज्ञान+अस्त्रः इत् इदं तु अवित्+गहनं छित्त्वा स्वस्थः भवेत्।३९। यः उत्तमं ज्ञान+पात्रं अग्र+जातिजं धाम लब्ध्वा आत्मनः श्रेयं न आचरति, तेन आत्मा ध्रुवं वंचितम्।४०। हे अम्ब! तस्मात् मे आरब्ध+विघ्ना न भव। ते नमः। अपि ते पुत्रो भविष्यति। मे ध्यानात् भवं तरिष्यसि।४१।

**सद्गुरूंची आवश्यकता -** जीवाचा सुखदुःखाशी असलेला संबंध अज्ञानजन्य आहे तर मग ह्या अज्ञानाचा परिहार कशाने होईल ज्यायोगे पुरुष कृतार्थ होतो? आत्म्याविषयीचे औपनिषद शब्दज्ञान तसेच परब्रह्माशी एकरूप होऊन झालेले विज्ञान ज्याला झाले आहे अशा म्हणजे श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंच्या प्रसादाने म्हणजेच श्रवणादि उपदेशाने हे अज्ञान दूर होते. आचार्यवान् म्हणजे गुरू असलेल्या पुरुषाला ज्ञान होते असे छांदोग्य उपनिषदाचे (६:१४:२) प्रतिपादन आहे. यावर कुणी असे म्हणेल की पद, वाक्य, प्रमाण यांचे ज्ञान असलेला कुणीही हे उपनिषदांतील शब्दज्ञान स्वतःच्या विचाराने प्राप्त करूं शकतो. तिथे सद्गुरूंचे काय प्रयोजन? याचे कारण असे आहे की हातांत समिधा धारण करून श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जाऊन ज्ञान मिळविण्याचाच, वेदांनी उपदेश (मुंडक उ. १:२:१२) केला आहे. छांदोग्यांतील (६:१४:२) दृष्टांताप्रमाणे गंधार देशाचा रहिवासी चोरांनी डोळ्यांवर पट्टी लावून बांधून ठेवल्यांने विवेकहीन आणि दिङ्मूढ होतो; तहानभुकेने व्याकुळ होतो; अरण्यांतील हिंस्र पशु, वाटमारे इत्यादि अनेक अनर्थांच्या भीतीने अर्धमेला होतो. त्यां वेळी त्याला स्वतःला आक्रोशाशिवाय कांहीच करतां येत नाही. असा तो दुःखार्त आणि अगतिक 'कुणी तरी येऊन आपली यांतून सुटका करावी' अशी तळमळ करीत उभा असतो. अशा वेळी कुणी तरी दयाळू माणूस येऊन त्याला बंधनांतून सोडवून त्याचे डोळे उघडतो. मग त्यानं सांगितलेल्या गंधार देशाच्या वाटेने जाऊन आपल्या घरी जाऊन सुटकेचा निःश्वास टाकून सुखी होते.

**इत्युक्त्वाऽदर्शयत्तस्यै स्वं रूपं दिव्यमुत्तमम् । साप्यदभ्रदृशा दृष्ट्वा तद्वित्तत्प्राग्जनिर्जगौ ।।४२।।**
**नमस्ते भगवन्देव प्राग्दृष्टो मर्तुकामया । कुपुत्रया मया स त्वं श्रीपादो मेऽद्य गोचरः ।।४३।।**

इति उक्त्वा तस्यै स्वं दिव्यं उत्तमं रूपं अदर्शयत्। सा अपि अदभ्र+दृशा दृष्ट्वा तत्+वित् तत्+प्राक्+जनिः जगौ।४२। (हे) देव! भगवन्! नमस्ते! प्राक् मया कुपुत्रया मर्तुकामया दृष्टः (यः) श्रीपादः सः त्वं अद्य मे गोचरः।४३।

त्याचप्रमाणे सच्चिदानंद जगदात्मनाच्या आपल्या नित्य स्वरूपापासून भ्रष्ट झालेला हा जीवात्मा आकाश, तेज आदि महाभूतांपासून झालेल्या आणि वात, पित्त, कफ, रक्त, मांस, रुधिर, मेद, मज्जा, शुक्र, कृमी, मल-मूत्र यांनी व्याप्त अशा या देहरूपी अरण्यांत शीत-ऊष्ण अशा अनेक द्वंद्वांच्या दुःखांनी गांजलेला, विवेकरूपी डोळ्यांवर मोह नांवाची पट्टी बंधल्याने अंध झालेला, पत्नी, पुत्र, बंधू, पशू अशा अनेक विषयांच्या तृष्णारूपी पाशाने बद्ध असलेला, पापपुण्यरूपी चोरांच्या तावडीत सांपडून, 'मी हा अमुक', 'हे माझे पुत्र', 'हे माझे बांधव', 'मी सुखी आहे', 'मी दुःखी आहे', 'मी मूर्ख', 'मी पंडित', 'मी जन्मलो', 'मी मेलो', 'मी म्हातारा', 'मी पापी', 'माझा मुलगा मेला', 'माझे धन गेले', 'माझा घात झाला', 'आतां मी कसा जगूं?', 'माझी काय गती?', 'मला कोण वांचवील?' अशा सहस्रावधी अनर्थांच्या जाळ्यांत सांपडलेल्या जीवाला कांही पूर्वपुण्याईमुळे, परमकृपाळू, शब्दज्ञानाने व्युत्पन्न आणि परब्रह्माच्या साक्षात्कारी जीवन्मुक्त सद्गुरूंची भेट होते. त्यांनी परमकारुण्याने संसारांतील दोष दाखवून दिल्याने तो पुरुष विरक्त होतो. मग ते दयाघन सद्गुरु त्याला 'तूं अमका, पुत्रादि युक्त संसारी नाहीस तर ते (ब्रह्म) तूं आहेस' असा उपदेश करून अविद्यारूपी मोहाची पट्टी सोडून त्याचे विवेकरूपी नेत्र उघडतात. त्यासाठी गीतेत निरूपिलेले जे **ज्ञेय** (१३:१२) अनादिमान् परब्रह्म आणि त्याच्या प्राप्तीची अमानित्वादि अठरा **ज्ञान**साधने ही **अस्त्रे** त्याला सद्गुरूंकडूनच मिळतात. त्यांनी गाढ अविद्येचा छेद करून तो स्वस्थ- आत्मस्वरूपांत स्थिर, होतो.३९. जो हा आत्मज्ञानाला योग्य असा ब्राह्मण देह मिळूनही आत्मकल्याणाचे साधन करीत नाही तो स्वतःची मोठीच फसवणूक करून घेतो.४०.

**ब्रह्मापि वेत्ति नो रूप-गुणांस्तु मोहिता त्वहम् । मानुषी त्वां कथं जाने दिष्ट्याद्य ज्ञानमर्पितम् ।।४४।।**
**कृतं मत्कुक्षिसंभूत इति लोकविडम्बनम् । अज ब्रह्माण्डकुक्षे न उभयं पावितं कुलम् ।।४५।।**

(तव) रूप+गुणान् तु ब्रह्मा+अपि नो वेत्ति। अहं तु मोहिता मानुषी त्वां कथं जाने? दिष्ट्या अद्य ज्ञानं अर्पितम्।४४। (हे) अज! ब्रह्मांडकुक्षे! मत्+कुक्षि+संभूत इति लोक+विडंबनं कृतम्। नः उभयं कुलं पावितम्।४५।

आई! तेवढ्यासाठी माझ्या ह्या उपक्रमाला अडसर होऊं नकोस. मी तुला नमस्कार करतो. आणि तुला आणखी मुलगा होईल. तसेच माझ्या ध्यानाने तूं हा भवसागर तरून जाशील.४१. असे बोलून श्रीगुरूंनी तिला (मातेला) आपले दिव्य परमश्रेष्ठ रूप दाखविले. तीसुद्धां ते रूप जाणून - पूर्वजन्मी आपल्याला वर देणाऱ्या भगवान श्रीपादवल्लभांना ओळखून म्हणाली.४२. ‘देवा, भगवंता! आपल्याला नमस्कार असो.४३. पूर्वजन्मी मी मूढ पुत्राच्या दुःखाने त्रासून आत्महत्या करीत असतांना मला दर्शन देणारे श्रीपादच आपण आज मला आपल्या दर्शनाने कृतार्थ करीत आहांत. मी असा आहे हे तुला आधीपासूनच (माझ्या जन्मापासूनच) कसे कळाले नाही? असे विचारशील तर तुझे रूप आणि गुण साक्षात् ब्रह्मदेवालाही कळत नाहीत. मी तर तुझ्या मायेने मोहित झालेली एक सामान्य स्त्री आहे. माझ्या परमभाग्याने आज मला हे (तुझ्या रूपगुणांचे) ज्ञान अर्पण केले आहेस.४४.’ ‘असा जर मी आहे तर तुझा मुलगा कसा झालो?’ असा प्रश्न अपेक्षून ती माता म्हणते आहे. ‘हे जन्म-मरणादिविकारांच्या अतीत असणाऱ्या आणि असंख्य ब्रह्मांडे आपल्या कुशींत धारण करणाऱ्या देवा! माझ्या कुशीतून जन्म घेण्याचे हे आपण लोकांना दाखविलेले एक नाटक मात्र आहे. ह्यामुळे आमची उभय कुळे पावन झाली आहेत.’४५.

**सत्यसङ्कल्प ते विघ्नं माऽस्तु रूपं स्थिरीकुरु । मयीदं चात्र भो स्थेयं यावत्पुत्रो भविष्यति ।।४६।।**
**तथेत्युक्त्वेशबुद्ध्याऽसौ स्थित्वा ताभ्यां सुपूजितः । तत्र शिक्षितवाञ्छिष्यान्विदुषोऽप्येष वेदवाक् ।।४७।।**
**अम्बापि गर्भिणी भूत्वा कालेऽसूत सुतौ शुभौ । स त्रैमासिकयोः शिश्वोः प्राहाम्बां शृणु मेऽम्ब भोः ।।४८।।**
**जातौ द्वौ ते भविष्यन्ति पुत्रौ पुत्री च सत्तमाः । देह्याज्ञां म इति प्रोक्त्वा तदाज्ञप्तः प्रचक्रमे ।।४९।।**

भो सत्यसङ्कल्प, ते विघ्नं मा अस्तु। मयि इदं रूपं स्थिरीकुरु। च यावत् पुत्रो भविष्यति अत्र स्थेयम्'।४६। तथा इत् उक्त्वा असौ तत्र स्थित्वा, ताभ्यां ईश+बुद्ध्या सुपूजितः, एष वेद+वाक् विदुषः अपि शिष्यान् शिक्षितवान्।४७। अम्बा अपि गर्भिणी भूत्वा काले शुभौ सुतौ असूत। शिश्वोः त्रै+मासिकयोः (सतोः) सः अम्बां प्राह। भोः मे अम्ब, शृणु।४८। (अधुना) ते द्वौ (पुत्रौ) जातौ। (परं) सत्तमाः पुत्रौ पुत्री च भविष्यन्ति। मे (गन्तुं) आज्ञां देही। इति प्रोक्त्वा तत्+आज्ञप्तः प्रचक्रमे।४९।

आपण आपला संकल्प खरा करणारे आहांत, आपल्या उपक्रमाला मी विघ्न करीत नाही. माझ्या चित्तांत हे आपले रूप स्थिर व्हावे तसेच आम्हांला पुत्र होईपर्यंत आपण इथेच राहावे अशी माझी प्रार्थना आहे.४६. मातेच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरु तिथे राहिले. त्यांच्या मातापित्यांनी त्यांचे ईश्वरबुद्धीने उत्तम प्रकारे पूजन केले. तसेच वेद हेच ज्याची वाणी आहेत अशा श्रीगुरूंजवळ अनेक विद्वान् शिष्यसुद्धां शिकूं लागले. पद, वाक्य, प्रमाणांनी उत्पन्न होणाऱ्या संशयरहित ज्ञानाचा त्यांना श्रीगुरूंनी उपदेश केला.४७. अम्बेनेही यथाकाल गर्भ धारण करून दोन छानशा मुलांना जन्म दिला. ती जुळी बाळे तीन महिन्यांची झाली असतां त्या श्रीगुरूंनी आईला बोलावून म्हटले, हे माझे आई, ऐक!४८. आतां तुला दोन पुत्र झाले आहेत. पुढे अगदी उत्तम असे आणखी दोन पुत्र आणि एक मुलगी तुला होतील. तरी आतां मला जाण्याची आज्ञा दे. असे बोलून आणि आणि मातेचा निरोप घेऊन श्रीगुरू घरांतून जायला निघाले.४९.

**रेजे शिरस्त्राणविशोभिमूर्धा सुपादुकामण्डितपादपद्मः ।**
**काषायवस्त्रावृतपेशलाङ्गः कौपीनधृग्दण्डकरः स्मितास्यः ।।५०।।**
**क्षमस्वार्भबुद्ध्या मयाजापराद्धमिति व्याहरन्तीं सतीं त्रिंशताब्दैः ।**
**पुनर्दर्शनं मेऽस्तु सांनिध्यमम्ब स्मृतावित्थमुक्त्वा ययौ तां निवर्त्य ।।५१।।**
**नायं मर्त्योऽस्तीश एनं नताः स्म एवं सद्भिः स्तूयमानो मुनीनः।**
**योगीशोऽपि द्राग्बदर्याश्रमं सद् द्रष्टुं काशीं प्राप वेषान्मुमुक्षोः ।।५२।।**

शिरः+त्राण+विशोभि+मूर्धा सुपादुका+मंडित+पाद+पद्मः काषाय+वस्त्र+आवृत+पेशल+अंगः कौपीन+धृक्+दण्ड+करः स्मित+आस्यः रेजे।५०। (हे) अज! मया अर्भ+बुद्ध्या अपराद्धं क्षमस्व! इति व्याहरन्तीं सतीं, (हे) अम्ब, त्रिंशत+अब्दैः मे पुन+दर्शनं अस्तु। स्मृतौ मे सान्निध्यं अस्तु। इत्थं उक्त्वा तां(तान्) निवर्त्य ययौ।५१। अयं मर्त्यः न (किंतु) ईशःअस्ति। एनं नताः स्म। एवं सद्भिः स्तूयमानः मुनीनः योगीशः अपि बदरि+आश्रमं द्रष्टुं मुमुक्षु+वेषेण काशीं प्राप।५२।

त्या वेळी जगदुद्धारासाठी घराबाहेर पडणाऱ्या त्या श्रीगुरूंच्या बालमूर्तीचे ध्यान या श्लोकांत दिले आहे. शिरस्त्राणाने मढवलेला चेहरा, छानशा पादुकांनी सजवलेली पदकमले, भगव्या वस्त्राने आच्छादलेली कोमल काया, कांसेला लंगोटी, चिमुकल्या हातांत दंड आणि स्मिताने विकसलेले तेजस्वी मुखकमल असे ते श्रीगुरू शोभत होते.५०. ‘जन्मादि देहधर्मातीत परमेश्वरा! मी बालबुद्धीने (अजाणतेपणाने किंवा तुला सामान्य बालक समजून) जे अपराध केले आहेत - तुला अडवले, बांधले, खाण्यापिण्यांत हेळसांड केली, कडेवर घेतले नाही किंवा वेळींच धुतले-पुसले नाही, त्यांची मला क्षमा कर!’ अशी काकळूत करणाऱ्या त्या साध्वीला, ‘तीस वर्षांनी तुला पुन्हा भेटेन, तूं स्मरण करतांच तुझ्या चित्तांत प्रकटेन’ असे आश्वासन देत तिला (आणि बरोबरच्या इतरही मंडळींना) निरवून श्रीगुरूंनी प्रयाण केले.५१. त्या वेळी सर्व साधुसज्जन म्हणूं लागले, ‘हा बालक खरोखर मर्त्य मानव नाही तर साक्षात् ईश्वरच आहे. आपण ह्याला नमस्कार करूं या.’ अशा प्रकारची वाखाणणी स्वीकारत, मुनिश्रेष्ठ योगीश्वर असूनही मुमुक्षूच्या वेषाने बदरिकाश्रमाच्या वाटेवर काशीला येऊन थांबले.५२.

**स खेचरत्सहृज्जिह्व उन्मन्यावस्थयाऽतपत् । तपः श्वासोछ्वासहीनः काश्यां वज्रासनस्थितः ।।५३।।**
**भागीरथ्यां त्रिषवणमथाप्लुत्य साष्टाङ्गयोगं युञ्जन्तं तं सकलमुनयः प्रेक्ष्य सिद्धासनस्थम् ।**
**नत्वाष्टाङ्गैः परतरधिया खेचरीमुद्रयैक-कुम्भोद्युक्तं जगुरुपरता नादसिद्धोत्समाधिम् ।।५४।।**

सः काश्यां वज्रासन+स्थितः खे+चरत्+स+हृत्+जिह्वः श्वास+उछ्वास+हीनः उन्मन्या अवस्थया तपः अतपत्।५३। भागीरथ्यां आप्लुत्य त्रिषवणं सिद्धासनस्थं स+अष्टांग+योगं युञ्जन्तं परतर+धिया खेचरी+मुद्रया एक+कुंभ+उद्युक्तं नाद+सिद्ध+उत्+समाधिं तं प्रेक्ष्य सकल+मुनयः उपरता परतर+धिया जगुः।५४।

काशीमध्ये वज्रासनावर (इथे त्याचा अर्थ सिद्धासन असा श्रीस्वामिमहाराजांनी केला आहे) जिह्वेसह मन आकाशांत नेणारी खेचरी मुद्रा धारण करून, श्वासोछ्वासरहित केवलकुंभक साधून, उन्मनी अवस्थेत खडतर तपाचे आचरण केले. तपानेच ब्रह्माला जाणावे या तैत्तरीय उपनिषदाच्या उक्तीचे (३:२) हे प्रात्यक्षिक लोकशिक्षणासाठी केले. श्रीगुरू नित्यमुक्त असल्याने त्यांना ह्या तपाचे कांहीच प्रयोजन नव्हते.५३. गंगेमध्ये त्रिकाल स्नान करून योगाच्या आठही अंगांचा अभ्यास करणाऱ्या, परमपदी बुद्धी स्थिरावणाऱ्या खेचरी (**खे** म्हणजे आकाश - सहस्रार चक्रांत जिह्वा आणि मन वि**चर**ते त्या) मुद्रेसहित, हठयोगप्रदीपिकेने सर्वश्रेष्ठ मानलेला (१:४५) केवलकुंभक साधून, अनाहतनादाच्या अनुसंधानाने सिद्ध झालेल्या उत्कृष्ट निर्विकल्प समाधीत निमग्न अशा त्या बालवयांतील श्रीगुरूंना पाहून काशीतील सर्व संन्यासी, 'हा परमेश्वरच आहे' अशा बुद्धीने त्यांच्या जवळ आदराने येऊन साष्टांग नमस्कार करून त्यांना म्हणाले.५४.

**भवान्परात्मास्ति न मर्त्यबालः सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारः ।**
**प्राक्शंकराचार्यमतोऽपि लुप्तः संन्यास एनं वितनोतु तिष्ये ॥५५॥**
**कष्टोत्थाद्यन्तवत्स्पर्श-भूभोगसुरतात्मभिः । उच्छिन्नोऽध्यात्मसौख्याज्ञैरयं कलिहतात्मभिः ॥५६॥**
**भीरूग्रे सुलभक्षेमे कलौ संन्यासवर्त्मना । अध्यात्मपरमानन्दं भगवन्दातुमर्हसि ॥५७॥**

भवान् मर्त्य+बालः न, (किन्तु) पर+आत्मा अस्ति। सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारः। प्राक् शंकराचार्य+मतः अपि संन्यासः तिष्ये लुप्तः। एनं (भवान्) तनोतु।५५। कष्ट+उत्थ+आदि+अन्त+वत्+भू+भोग+सुरत+आत्मभिः कलि+हत+आत्मभिः अध्यात्म+सौख्य+अज्ञैः अयं उच्छिन्नः।५६। (हे) भगवन्! भीरु उग्रे सुलभ+क्षेमे कलौ संन्यास+वर्त्मना अध्यात्म+परम+आनंदं दातुं अर्हसि।५७।

आपण सामान्य मानवी बालक नाहीत तर प्रत्यक्ष परमेश्वरच आहांत. साधूंच्या आणि धर्माच्या रक्षणासाठी आपण अवतार धारण केला आहे. पूर्वी शंकराचार्यांनी प्रतिष्ठित केलेला संन्यासमार्ग या कलिकाळांत सुप्तप्राय झाला आहे. त्याचा आपण प्रसार करावा. वास्तविक स्मृतिकारांनी अग्निहोत्र, यज्ञांत पशूचा बळी, संन्यास, श्राद्धांत मांसपाक, दीरापासून पुत्रोत्पत्ती या पांचांचा कलियुगांत निषेध असतांना संन्यासाच्या पुनःप्रतिष्ठेची प्रार्थना करण्याचे कारण असे आहे की स्मृतींनीच कलिकाळांतही जोंपर्यंत वेदांचे अध्ययन चालू आहे, वर्णाश्रमधर्माचे आचरण करणारे लोक आहेत तोंवर अग्निहोत्र आणि संन्यास यांचा स्वीकार करण्याची आज्ञाही स्मृतींनी केलेली आहे.५५. स्वाभाविक अशा विषयसुखांत आसक्त असलेल्यांनी या कष्टकर संन्यासाचा आश्रय कां बरे करावा? तर तो मोक्षात लाभणाऱ्या नित्य, निरुपाधिक, निरतिशय सुखासाठी! असे जर आहे तर मग तो संन्यासमार्ग लोकांनी कां टाकून दिला? याचे उत्तर या श्लोकांत दिले आहे. खरे तर इंद्रियांच्या आणि विषयांच्या संयोगापासून उद्भवणाऱ्या भोगांना आदि आणि अंत असतात. ते भोग अनित्य असतात, क्षणभंगुर असतात. तसेच ते विषयपरतंत्र असतात. हवा असलेला विषय हवा तेव्हां मिळेलच असे नसते. त्या सुखांना सीमा असते. अशा या विषयोपभोगांत रमून गेलेल्या, कलीच्या प्रभावाने बुद्धी दूषित झालेल्या आणि म्हणूनच अध्यात्मांतील स्वतंत्र, निरंतर आणि असीम सुखाची जाणीवही नसलेल्या जनसामान्यांनी ह्या संन्यासमार्गाचा उच्छेद केला आहे.५६.

**इत्याश्रुत्योक्तमाचार्यं वृत्वा कृष्णसरस्वतीम् । ततः संन्यास्यभून्नाम्ना स नृसिंहसरस्वती ।।५८।।**
**न्यस्तसूत्रशिखो रेजे न्यस्तसर्वैषणो वशी । संन्यस्ताखिलसङ्कल्पः संन्यासी निर्ममोऽद्वयः ।।५९।।**
**संन्यासपद्धतिं प्राह मुमुक्षुभ्यो जगद्गुरुः । विरजोमाञ्छुचिर्देवीं प्रविष्टो हापितैषणः ।।६०।।**

इति (तैः) उक्तं आश्रुत्य, कृष्णसरस्वतीं आचार्यं वृत्वा ततः स नाम्ना नृसिंहसरस्वती संन्यासी अभूत्।५८। न्यस्त+सूत्र+शिखः न्यस्त+सर्व+एषणः वशी संन्यस्त+अखिल+संकल्पः निर्ममः अद्वयः संन्यासी रेजे।५९। (ततः) जगद्गुरुः मुमुक्षुभ्यः संन्या+पद्धतिं प्राह। शुचिः विरजोमान् देवीं प्रविष्ट त्यक्त+एषणः (संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्)।६०।

भगवंता! भित्र्यांना उग्र भासणाऱ्या, पण तरी मोक्षप्राप्ती ज्या युगांत सुगम आहे अशा या कलिकाळांत संन्यासाच्या मार्गाने अध्यात्माचे परमसुखाचे दान देण्यास आपणच समर्थ आहांत.५७. अशा त्यांच्या म्हणण्याला मान देऊन श्रीगुरूंनी कृष्णसरस्वतींना गुरू करून संन्यास घेतला आणि नृसिंहसरस्वती हे नांव धारण केले.५८. केवळ नावानेच नाही तर आचरणानेही ते संन्यासी झाले. संन्यासधर्माला अनुसरून शेंडी आणि जानवे तर त्यांनी त्यागलेच, पण त्याचबरोबर दारा (पुत्र), वित्त आणि लौकिक या तीनही एषणांचाही त्याग केला; समस्त संकल्पांचाही त्याग केला; विषयांच्या त्यागाने इंद्रियांवर ताबा मिळवला; ममता आणि सुख-दुःखादि द्वंद्वांचासुद्धां त्याग करून ते संन्यासधर्माला भूषणावह झाले. कठरुद्रोपनिषदाच्या (५) वचनानुसार यज्ञोपवीत आणि वैदिक कर्मादिकांचा त्याग करून परमहंसोपनिषदांत (२) ज्याला मुख्य संन्यासी म्हटले आहे असे ते परमहंस झाले.५९. त्यानंतर जगद्गुरू श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांनी मुमुक्षूंना संन्यासधर्माचे शिक्षण द्यायला आरंभ केला. 'कुत्र्याच्या वांतीप्रमाणे सर्व - ब्रह्मलोकापर्यंत ऐहिक आणि पारलौकिक मनापासून पूर्णपणे त्यागावे; शिखा तसेच यज्ञोपवीत काढून टाकावीत; प्रायश्चित्तांनी शुद्ध व्हावे; विरजा होम करावा; गायत्रीप्रवेश करावा आणि तीनही एषणांचा त्याग करावा.' परमहंसोपनिषदाच्या (२) वचनाला अनुसरून आपल्या शरीरभोगासाठी आणि लोकोपकारासाठी लंगोटी, दण्ड आणि छाटी यांचा परिग्रह करावा. हा दंडी या शब्दाचा भावार्थ आहे. वर सांगितलेल्या मुख्य संन्यासाहून वेगळा आहे. हा विविदिषा संन्यास आहे. विद्वत् संन्यास नव्हे. अशा रीतीने विविदिषा संन्यास घेऊन सद्गुरूंना शरण जावे.६०.

**संन्यस्तसकलोऽसूत्र-चूडो दण्डी गुरुं भजेत् । प्रज्ञानं ब्रह्मायमात्मा ब्रह्म तत्त्वमसीति च ।।६१।।**
**अहं ब्रह्मास्मीति महा-वाक्यान्याप्त्वार्थतो वशी । पञ्चीकरणविल्लब्ध-संज्ञः शौची स्वधर्मवित् ।।६२।।**
**दैवभावो योगपट्टी संन्यासी श्रेयसेऽर्हति । गतिज्ञो धारणाभ्यासाज्जीवन्मुच्येत्परात्मदृक् ।।६३।।**

(संन्यस्त+सकलः असूत्र+चूडः दण्डी गुरुं भजेत्।) 'प्रज्ञानं ब्रह्म', 'अयमात्मा ब्रह्म', 'तत्त्वमसि' इति अहं 'ब्रह्मास्मि' इति च महावाक्यानि अर्थतो आप्त्वा, पंचीकरण+वित् लब्ध+संज्ञः शौची स्वधर्म+वित् दैवभावो, योगपट्टधारी संन्यासी श्रेयसे अर्हति। गतिज्ञो धारणा+अभ्यासात् परात्म+दृक् जीवन् मुच्येत।६१-६३।

ऋग्वेदांतर्गत (ऐतरेय उ. ३:१:३) 'प्रज्ञानच ब्रह्म' (आहे), यजुर्वेदांतर्गत 'मी ब्रह्म आहे' (बृहदारण्यक उ.१:४:१०), सामवेदांतर्गत, 'ते तू आहेस', (छांदोग्य उ. ६:८:७) आणि अथर्ववेदांतर्गत 'हा आत्मा ब्रह्म (आहे)' (मांडूक्य उ. २) ही चार महावाक्ये सद्गुरूंकडून त्यांच्या अर्थासह श्रवण करावीत.

**प्रज्ञानं ब्रह्म :-** ऐतरेय उपनिषदांत प्रथम केवळ एक ब्रह्मच काय ते होते; दुसरे कांहीच नव्हते. त्या एकमेवाद्वितीय ब्रह्माने ईक्षणमात्रे चराचर सृष्टी केली. सर्व इंद्रिये निर्मिली. जीवांच्या दैनंदिन व्यवहारासाठी नेत्र, कण्ठ आणि हृदय या स्थानी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या अवस्था निर्मिल्या. देहांतराच्या व्यवहारासाठी पितृशरीर, मातृशरीर आणि स्वशरीर असा सर्व प्रपंच निर्माण करून त्यांत प्रवेश केला. ह्या अध्यारोपाचा अपवाद करण्यासाठी तो देहप्रविष्ट प्रत्यगात्मा ब्रह्मस्वरूपच आहे असे प्रतिपादन उपनिषदांत केले आहे. त्यानंतर आत्मज्ञानाचे मुख्य साधन जे वैराग्य त्याच्या उत्पत्तीसाठी *'पुरुषे ह वा'* (ऐतरेय उ. २:१:१) इत्यादींनी गर्भवासादि दुःखांचे वर्णन करून प्रज्ञारूपी आत्माच ब्रह्म आहे हे या वाक्याने प्रतिपादले आहे. विद्यारण्यस्वामींनी ह्या महावाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे.

**ब्रह्मीभूतस्य गव्यात्मा व्यसुः क्षेप्योऽप्क्रियादि नो । इत्युक्त्वा ग्राहयामास संन्यासं स्वधिकारिणः ।।६४।।**

ब्रह्मीभूतस्य व्यसुः आत्मा गवि क्षेप्यः। अप्+ क्रियादि नो। इति उक्त्वा सु+अधिकारिणः संन्यासं ग्राहयामास।६४।

*येनेक्षिते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादू विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितं ।*
*चतुर्मुखेन्द्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्म मय्यपि ।। पंचदशी ५:१-२*

ब्रह्मदेव, इंद्रादि देव तसेच मनुष्य, घोडे, गाई इत्यादीसुद्धां ज्या एका चैतन्याद्वारे ऐकतात, हुंगतात, व्यक्त करतात, गोड-अगोड अनुभवतात त्याला प्रज्ञान म्हणतात. तेच प्रज्ञान माझ्यांतही आहेच. तेच ब्रह्म होय.

**अहं ब्रह्मास्मि -** हे यजुर्वदांतर्गत महावाक्य आहे.

*परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि । बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ।*
*स्वतःपूर्णः परात्मात्र ब्रह्माब्देन वर्णितः । अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म भवाम्यहं ।। पंचदशी ५:३-४*

अधिकारी साधकांच्या बुद्धीत साक्षित्वाने अहं म्हणून स्फुरणारे चैतन्य (जीवात्मा) हा 'मी' शब्दाचा अर्थ. सर्वव्यापी सच्चिदानंद स्वयंपूर्ण परमात्मा म्हणजेच 'ब्रह्म'. 'आहे' या शब्दाने दोहोंचे ऐक्य दाखविले आहे.

**तत्त्वमसि -** हे सामवेदांतर्गत वाक्य आहे.

*एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितं । सृष्टेः पुराधुनाऽप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ।*
*श्रोतुर्देहेन्द्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितं । एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयतां ।। पंचदशी ५:५-६*

**ततः प्रभृति संन्यासः संप्रवृत्तोऽमृतायनः । काश्यां पुमर्थवेदार्थान्प्रकाश्योत्तरवर्त्मना ।।६५।।**

ततः प्रभृति अमृतायनः संन्यासः संप्रवृत्तः्। काश्यां पुं+अर्थ+वेद+अर्थान् प्रकाश्य उत्तर+वर्त्मना ।६५।

सृष्टीच्या पूर्वी आणि प्रलयाच्या नंतरही जसेच्या तसेच राहणाऱ्या, अविकारी, एकमेवाद्वितीय, सच्चिदानंद परमात्मस्वरूपाला 'ते' (तत्पदाने) म्हणून श्रवण करणाऱ्या शिष्याच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या पलीकडील चैतन्याचा 'तू' या शब्दाने (त्वंपदाने) निर्देश केला आहे. 'आहेस' (असिपदाने) शब्दाने हे दोन्हीचा अभेद प्रतिपादला आहे.६१.

**अयमात्मा ब्रह्म -** हे अथर्ववेदांतील महावाक्य आहे.

*स्वप्रकाशापरोक्षत्वमयमित्युक्तितो मतं । अहंकारादिदेहांतात्प्रत्यगात्मेति गीयते ।*
*दृश्यमानस्य सर्वस्य जगत्स्तत्त्वमीर्यते । ब्रह्माब्देन तद्ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम ।। पंचदशी ५:७-८*

आपल्या अंतरांत प्रकाशून प्रतीतीला येणारा अपरोक्ष 'हा' अहंकाराने स्थूल देहाला बांधल्यासारखा भासणारा 'आत्मा'च (प्रत्यगात्मा) अनुभवाला येणाऱ्या सर्व जगताचे मूलतत्त्व असलेले 'परोक्ष ब्रह्म' आहे असा याचा अर्थ आहे.

*सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः । ब्रह्मापरोक्षसिद्ध्यर्थं महावाक्यमितीरितम् ।*
*वाक्यवृत्तावतो ब्रह्मापरोक्ष्यविमतिर्न हि ।। पंचदशी ७:६९-७०*

ही महावाक्ये त्यांच्या अर्थासह जाणून पंचीकरणाचे ज्ञान प्राप्त करून संज्ञा म्हणजे संन्यासाश्रमांतील नांव (योगपट्ट) धारण करून, बाह्य आणि आंतरिक शौच (बाहेरी कर्मे क्षाळिला। अंतरीं ज्ञानें उजळिला।) संपादन करून आपल्या (संन्यास) धर्माचे पालन करणारा,६२. दैवी संपत्तीयुक्त योगपट्टधारी संन्याशालाच मोक्षाची योग्यता असते. उत्तरायण, शुक्ल पक्ष आणि दिवस या काळांच्या अभिमानी देवतांद्वारां गंवसणाऱ्या सूर्यकिरणानुसारी गतीचे ज्ञान असणारा हा संन्यासी ब्रह्मसूत्रांत सांगितल्याप्रमाणे (४:२:१८-२०) रात्री किंवा दक्षिणायनांतही मरण पावला तरी ब्रह्मलोकालाच जातो.

**मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मापि सुशिष्ययुक् । तीर्थस्नातो ययौ गङ्गा-सागरं भक्तगुप्तये ।।६६।।**

मेरुं प्रदक्षिणीकृत्य पूतात्मा+अपि सुशिष्य+युक् तीर्थ+स्नातो भक्त+गुप्तये गंगा+सागरं ययौ।६५-६६।

अशा यतीला धारणेच्या अभ्यासाने जिवंत असतांनाच मुक्तीचा लाभ होतो. नाभी, हृदय, आज्ञाचक्र इत्यादि देशांवर चित्त एकाग्र करणे म्हणजे 'धारणा'. त्या धारणेचा नित्य अभ्यास करणारा यति, **पर** म्हणजे ब्रह्म आणि **आत्मा** म्हणजे प्रत्यगात्मा यांच्यांत अभेद दृष्टी ठेवून जिवंतपणीच अविद्या, काम आणि कर्म यांच्यापासून मुक्त होतो.६३. ब्रह्मीभूत झालेल्या गतप्राण यतीचा देह शक्य तर पाण्यांत सोडावा अथवा ते शक्य नसेल तर जमिनीत पुरावा. **गो** या शब्दाचे पाणी आणि भूमी असेही अर्थ होतात. गतप्राण हे मुंडकोपनिषदांत (३:२:७) वर्णन केलेल्या सर्व कलांच्या निर्गमनाचे उपलक्षण आहे. पंचदश कला आपल्या आधारभूत महाभूतांसह इंद्रियांच्या अधिष्ठानभूत देवतांत विलीन होतात. कर्म, बुद्धी आणि आत्मा हे सर्व परमात्मस्वरूपाशी एकत्व पावतात. छांदोग्य उपनिषदाच्या कथनानुसार (४:१५:५) अशा ज्ञानी पुरुषाच्या देहाचे दहन केले अथवा न केले तरी तो देवयान पंथाने ब्रह्मलोकाला जातो. त्यावर भाष्यकारांनी त्यांचे दहन करू नये असे स्पष्ट केले आहे. अप् म्हणजे जल. जलक्रिया या शब्दाने अंजली, पिंड, निर्वाप, एकोद्दिष्ट श्राद्ध, करण, मासिक श्राद्ध इत्यादि करूं नयेत. मुलगा असेल तर त्याने इतर पितरांसाठी आणि पुत्रत्वाचे कर्तव्य म्हणून पार्वण श्राद्ध करावे. असा हा संन्यासधर्म सर्वांना सांगून श्रीगुरू उत्तम अधिकारी शिष्यांनाच संन्यास देत असत. यावरून अनधिकारी शिष्याला दिलेला संन्यास त्याच्या पतनालाच कारण होतो हे लक्षांत ठेवावे.६४.

तेव्हांपासून मुक्तीचा मार्ग असा संन्यासाश्रम पुनःप्रतिष्ठित झाला. अशा रीतीने श्रीगुरूंनी कांही काळ काशीत चित्तांतील अंधःकार दूर करणाऱ्या वेदांच्या बोधाने योग्य शिष्यांना चारी पुरुषार्थ प्राप्त करविले. नंतर उत्तरेकडील मार्गाने मेरूला सव्य प्रदक्षिणा करून स्वतः पावित्र्याची मूर्ती असलेले श्रीगुरू भक्तांच्या रक्षणासाठी तीर्थांमध्ये स्नान करीत गंगासागराला येऊन पोचले.६५.

**कारयित्वा बहिःस्पर्शान्बाह्यान्सोऽन्ते दृशं भ्रुवोः । प्राणापानौ च खे तुल्यौ यतिभ्यो योगमादिशत् ।।६७।।**
**प्रयागेऽथैत्य संन्यासं माधवब्रह्मणे ददौ । विभुस्तत्त्वोपदेशं च निजोद्भवभुवं ययौ ।।६८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**यत्प्रसादान्नरा मुक्ता अद्वैतामृतवर्षिणः । भवन्त्यस्य किमाचार्यैः कोऽयं कृष्णसरस्वती ।।६९।।**

बहिः+स्पर्शान् बाह्यान् कृत्वा सः दृशः अन्ते भ्रुवोः (कारयित्वा), प्राण+अपानौ खे तुल्यौ (कारयित्वा) यतिभ्यः योगं आदिशत्।६७। अथ प्रयागे एत्य विभुः माधवब्रह्मणे संन्यासं तत्त्व+उपदेशं च ददौ। (ततः) निज+उद्भव+भुवं ययौ।६८। नामधारक उवाच। अद्वैत+अमृत+वर्षिणः यत्+प्रसादात् नरा मुक्ता भवन्ति अस्य किं आचार्यैः? अयं कृष्णसरस्वती कः?६९।

बाहेरच्या रूपरसादि विषयांचे चिंतन केल्याने ते चित्तांत प्रवेश करतात. त्यासाठी त्यांचे चिंतन सोडून त्यांना बाहेरच ठेवायचे. मग दृष्टी भुंवयांच्या मध्यावर स्थिर करायची. डोळे एकदमच मिटले तर चित्त झोपेत लीन होते आणि उघडे ठेवले तर ते चित्त बाहेरच्या विषयांकडे धांवतेय म्हणून अर्धोन्मीलित दृष्टीने भुंवयांच्या मध्यावर दृष्टी केंद्रित करून ती हृदयाकाशांत स्थिर करावी. नासिकेंतून प्रवाहित होणारे श्वास आणि उछ्वास मंद करून ते नासिकेंतच सम करायचे. अशा प्रकारच्या ह्या योगाचा अभ्यास यतींच्याकडून श्रीगुरूंनी करून घेतला.६७. त्यानंतर श्रीगुरूंनी प्रयाग क्षेत्री येऊन माधव नांवाच्या ब्राह्मणाला संन्यास दिला आणि त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. तेथून पुढे ते आपल्या जन्मभूमीला गेले.६८. यावर नामधारकाने प्रश्न केला की मोक्षरूपी अमृताची वृष्टी करणाऱ्या श्रीगुरूंच्या प्रसादाने मानवांना मुक्ती मिळते. त्यांना आचार्य करण्याचे काय प्रयोजन? शास्त्रार्थाचे आलोडन करून त्यांतील वेचक तत्त्वांचा इतरांनाही बोध करून देऊन त्यांच्याकडून ती आचारणात आणतात आणि स्वतःसुद्धां त्यांचे आचरण करून आदर्श उभा करतात त्यांना आचार्य म्हणतात. (*'आचिनोति हि शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि। स्वयं चाचरते यस्मात्तेनाचार्यः स उच्यते।।'*) आणि हे कृष्णसरस्वती कोण होते?६९.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सांदीपनिवसिष्ठाद्याः कृष्णरामादिभिर्वृताः । गुरवोऽपि तथाऽजेन वृतः कृष्णसरस्वती ।।७०।।**
**मानुष्यं लीलयासाद्य स तद्वद्वर्तते न चेत् । वर्तेत सङ्करो लोके भवेत्तदनुवर्तितः ।।७१।।**
**येनाध्यक्षेण मा सूते जगत्तेन न बद्ध्यते । असक्तोऽयमुदासीन-वत्स्थितः किमुतेतरैः ।।७२।।**
**शिष्यो विष्णुः पुरेशस्य विष्णोर्विधिरभूद्विधेः । वसिष्ठस्तस्य शाक्त्योऽस्य व्यासस्तस्य शुकोऽस्य तु ।।७३।।**
**गौडपादोऽस्य गोविन्दः शंकरस्तस्य तस्य तु । विश्वरूपस्तस्य बोध-ज्ञानः सिंहगिरिस्तथा ।।७४।।**
**तस्येश्वरो नृसिंहोऽस्य विद्यातीर्थं ततः शिवः । तस्य भागीरथीतीर्थं विद्यारण्योऽस्य तस्य तु ।।७५।।**
**शिष्योऽभून्मलयानन्दो देवतीर्थं सरस्वती । यादवेन्द्रोऽस्य तस्यायं शिष्यः कृष्णसरस्वती ।।७६।।**

सिद्ध उवाच। कृष्ण+रामदिभिः अपि सांदीपनि+वसिष्ठाद्याः गुरवः वृतः। तथा अजेन कृष्णसरस्वती वृतः।७०। लीलया मानुष्यं आसाद्य सः तत्+वत् वर्तते। न वर्तते चेत् तत्+अनु+वर्तितः लोके सङ्करो भवेत्।७१। येन अध्यक्षेण मा जगत् सूते तेन अयं न बद्ध्यते। अयं असक्तः उदासीनवत् स्थितः। इतरैः किं उत?।७२। पुर+ईशस्य विष्णुः शिष्यः। विष्णोः विधिः (शिष्यो) अभूत्। विधेः वसिष्ठः। तस्य शाक्त्यः। तस्य व्यासः। तस्य शुकः। अस्य (शुकस्य) तु गौडपादः। अस्य गोविन्दः। तस्य शंकरः। तस्य (शंकरस्य) तु विश्वरूपः। तस्य बोधज्ञानः। तथा (तस्मात्) सिंहगिरिः। तस्य ईश्वरः। अस्य नृसिंहः। (अस्य) विद्यातीर्थः। ततः शिवतीर्थः। तस्य भागीरथीतीर्थः, अस्य विद्यारण्यः। तस्य तु मलयानंदः शिष्यः अभूत्। (तस्य) देवतीर्थः। (तस्य) सरस्वतीयादवेन्द्रः। अस्य अयं शिष्यः कृष्णसरस्वती।७३-७६।

सिद्ध सांगतात की राम, कृष्ण इत्यादि पूर्वींच्या अवतारांनीही सांदीपनि, वसिष्ठ इत्यादि गुरू केले. त्याचप्रमाणे अविकारी श्रीगुरूंनीही कृष्णसरस्वतींना गुरू केले.७०. स्वच्छेने लीलेने त्याने (भगवंताने) मानवदेह धारण केला असला तरी त्याला अनुसरून ते मानवांना योग्य असेच आचरण करतात. तसे त्यांनी न केले तर अनुकरणशील लोकही विपरीत आचरण करतील आणि भगवंत संकराला कारण होतील.७१.

**सर्वे स्वदीक्षाङ्किताख्या जाताः कृष्णसरस्वती । पारंपर्योत्तमो ज्ञानी वृद्धोऽतोऽयं वृतोऽमुना ।।७७।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे श्रीनृसिंहसरस्वत्यवतारकथनं नामाष्टमोऽध्यायः ।।**

सर्वे स्वदीक्षित+अंकित+आख्याः जाताः। कृष्णसरस्वती पार्यंपर+उत्तमः ज्ञानी वृद्धः। अतः अयं अमुना वृतः।७७।

आतां कृष्णसरस्वतींची गुरुपरंपरा सांगत आहेत. भगवान शंकरांचे शिष्य विष्णू, विष्णूंचे शिष्य ब्रह्मदेव; ब्रह्मदेवांचे शिष्य वसिष्ठ ऋषी; त्यांचे शिष्य पराशर; पराशरांपासून व्यास; व्यासांचे शिष्य शुकाचार्य; शुकाचार्यांचे गौडपादाचार्य; त्याचे शिष्य गोविंदयति; हे भ.पू.पा. शंकराचार्यांचे गुरू; आदिशंकराचार्यांचे शिष्य विश्वरूपाचार्य; त्यांचे बोधज्ञान; त्यांचे शिष्य सिंहगिरी; त्यांच्यापासून नृसिंह; मग विद्यातीर्थ, त्यांचे शिष्य शिवतीर्थ, त्यांचे भागीरथीतीर्थ; हे विद्यारण्यस्वामींचे गुरू; त्यांचे शिष्य मलयानंद; त्यांच्यानंतर देवतीर्थ; त्यांपासून सरस्वतीयादवेन्द्र; यांचेच शिष्य कृष्णसरस्वती होत.७३-७६. सर्वांचे योगपट्ट त्यांच्या त्यांच्या दीक्षेनुसार झाले. तीर्थ, आश्रम इत्यादि उपपदे उपदेश, दंडदानादींची दीक्षा ज्या गुरुस्वामींकडून घेतली त्याची असतात. इथे दिलेला परंपराक्रम हा ज्ञानोपदेशाचा आहे. त्यामुळे उपपदाची भिन्नता दिसून येते. हे कृष्णसरस्वती अशा उत्तम परंपरेचे ज्ञानी असल्याने तसेच वृद्ध असल्याने त्यांना श्रीगुरूंनी आचार्य केले.७७.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा आठवा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# नवमोऽध्यायः

**श्रीगणेशाय नमः। नवव्या अध्यायी जन्मभूमी पाहुनी। श्रीगुरु विप्राचा पोटशूल वारुनी।**
**सायंदेवाचे यवनभय हरुनी। तीर्थयात्रा वर्णिती।।१।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भगवानपि संन्यासं प्रगृह्य स्वजनुस्थलम् । कुतो यातोऽस्य शिष्याः स्युः के के किमकरोत्ततः ।।१।।**

नामधारक उवाच। भग+वान् अपि संन्यासं प्रगृह्य स्व+जनु+स्थलम् कुतो यातः? अस्य शिष्याः के के स्युः? ततः (श्रीगुरुः) किं अकरोत्?१।

मागच्या अध्यायांत सिद्धमुनींनी श्रीगुरूंनी संन्यासाश्रम स्वीकारल्याचे वर्णन केले; आणि अध्यायाच्या शेवटी आपल्या जन्मभूमीला गेले असे सांगितले. तेव्हां नामधारकाला ते संन्यासाश्रमाला योग्य नाही असे वाटून त्याने प्रश्न केला आहे.

सर्व ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, औदार्य आदींनी संपन्न असलेल्या ('ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां **भग** इतीङ्गना।।') **भगवान्** श्रीगुरूंनी संन्यास घेऊनही ते आपल्या जन्मस्थळी कां गेले? त्यांचे शिष्य कोण कोण झाले? जन्मभूमीला जाऊन पुढे त्यांनी काय केले?१.

## ।। सिद्ध उवाच ।।

**महीं प्रदक्षिणीकृत्य प्रतिज्ञातानुसार्यजः । मातरं द्रष्टुमाप्तो हि माता वन्द्या यतेरपि ।।२।।**
**शिष्या हि बहवो जाता बालः कृष्ण उपेन्द्रकः । ज्ञानज्योतिः सदानन्दो माधवोऽहं च सप्तमः ।।३।।**
**सरस्वत्यन्तसंज्ञाः स्युरेते मुख्यास्तु भूरिशः । आसन्नन्ये स तैः साकमाययौ स्वजनुस्थलम् ।।४।।**

सिद्ध उवाच। महीं प्रदक्षिणी+कृत्य प्रतिज्ञात+अनुसारी अजः मातरं द्रष्टुं आप्तः। हि यतेः अपि माता वन्द्या।२। शिष्या हि बहवः जाताः। बालः, कृष्णः, उपेन्द्रः, ज्ञानज्योतिः, सदानंदः माधवः, अहं च सप्तमः।३। एते सरस्वति+अंत्य+संज्ञाः मुख्याः स्युः। अन्ये तु भूरिशः आसन्। सः तैः साकं स्वजनु+स्थलं आययौ।४।

तीस वर्षांनी पुन्हां माझे दर्शन होईल, असे आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी आणि माता संन्याशालाही वंदनीय असल्याने तिच्या दर्शनासाठी भगवान आले असे उत्तर देतांना सिद्ध म्हणतात पृथ्वीला (मेरु पर्वताला) उजव्या बाजूने परिक्रमा (प्र+दक्षिणं) करून **अजन्मा** श्रीगुरू (इथे अजन्मा शब्दांतून ते मर्त्य नसून केवळ माणूसपणाचे नाटक करीत असल्याचे सुचविले आहे) आईला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी संन्याशालाही वंद्य अशा मातेच्या दर्शनाला आले. श्रुतीच्या आज्ञेप्रमाणे (जाणत्याने सत्यच बोलावे; खोटे बोलणाऱ्याचा समूळ परिशोष होतो. प्रश्न उ. ६:१) आपल्या वचनाच्या पूर्तीसाठी श्रीगुरू कारंजाला आले. नामधारकाच्या पहिल्या प्रश्नाचे हे उत्तर आहे.२.

कोण कोण शिष्य झाले या प्रश्नाचे उत्तर पुढच्या श्लोकांत देत आहेत. आपल्या ज्येष्ठ पुत्राचे आयुष्य वाढावे अशा हेतूने जसे संसारी लोक त्याच्या नांवाचा उच्चार न करतां त्याला बाळ अशा नांवाने हांक मारतात त्याचप्रमाणे भगवंतांनीही आपल्या पुत्रवत् पहिल्या आणि निकटवर्ती शिष्याचे नांव बालसरस्वती असे ठेवले.

**पितरौ प्रेक्ष्य बन्धूंश्च भगिनीमितरानपि । तत्राददे विश्वरूपः पूजां प्रत्यालयं क्षणात् ।।५।।**

पितरौ, बंधून्, भगिनीं च, इतरान् अपि प्रेक्ष्य तत्र विश्वरूपः क्षणात् प्रति+आलयं पूजां आददे।५।

कारण शिष्यसुद्धां पुत्राप्रमाणेच गौणात्मा मानला आहे. व्यावहारिक पितासुद्धां संन्यास घेतांना किंवा मृत्यूच्या समयी पुत्राला 'तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस' असे अनुशासन करतो आणि त्यानुसार पुत्रही 'मी ब्रह्म आहे, यज्ञ आहे, लोक आहे' असे म्हणतो (बृहदारण्यकोपनिषत् १:५:१७). त्याचा भाव असा - तुम्ही शिकविलेल्या ब्रह्माचे म्हणजे वेदांचे मी अध्ययन आणि अध्यापन करीन, तुम्ही अनुष्ठिलेल्या यज्ञांचे मी अनुष्ठान करीन आणि तुम्ही संपादिलेले स्वर्गादि लोक मीही प्राप्त करीन. याच अर्थाने एतरेय उपनिषदांत (२:४) पुत्राला पुण्यकर्मांत प्रतिनिधित्व करणारा आत्मा असे म्हटले आहे. परमार्थमार्गांतही परम्परा अखंड चालण्यासाठी गुरू आपल्या शिष्याला प्रतिनिधित्व देतो. वेदांनीही शिष्यप्रशिष्य इत्यादि परंपरेला कुल अशीच संज्ञा दिली आहे. मुंडक (३:२:९) आणि मांडूक्य (१०) उपनिषदांत ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या कुळांत ब्रह्म न जाणणारा होत नाही असे म्हटले आहे त्याचा अभिप्राय गुरुकुल असाच आहे. बालसरस्वतीनंतर कृष्ण, उपेन्द्र, ज्ञानज्योती, सदानंद, माधव आणि सातवा स्वतः सिद्ध अशी मुख्य शिष्यांची नांवे सांगितली आहेत.३. सिद्ध पुढे म्हणतात परमगुरू कृष्णसरस्वतींनी दक्षिणमठ संप्रदायाला अनुसरून श्रीगुरूंना नरसिंहसरस्वती असा योगपट्ट दिला तसाच आम्हां सर्व शिष्यांच्याही नांवांच्या शेवटी सरस्वती हे उपनाम दिले. त्यांतील वरील सात जण मुख्य होत. त्याशिवायही अनेक इतर शिष्य होते. त्या सर्वांच्या सह श्रीगुरू आपल्या मातृभूमीला - कारंजाला आले.४. आई-वडील, बंधू, बहीण तसेच इतरही पूर्वाश्रमाचे संबंधी लोक यांना भेटून त्या कारंजा गांवी श्रीगुरूंनी एका वेळी अनेक रूपे धारण करून घरोघरी जाऊन सर्वांची पूजा स्वीकारली.५.

**पित्रार्चितममुं दृष्ट्वा प्राक्स्मृत्याऽम्बाब्रवीत्प्रिय । मृत्यून्मुखीं कुपुत्रां मां योऽरक्षच्छ्रीपदस्त्वयम् ।।६।।**
**मादृग्भवेत्सुत इति प्रतिज्ञातसुसिद्धये । स्वदृगन्यसुताभावात्स्वयमेवाभवत्सुतः ।।७।।**
**श्रीपाद मे त्वं न सुतोऽसि देव भवार्णवादुद्धर मा हरेऽज ।**
**लोकानुसारी खलु वर्तसे चेत् सम्बन्धमेनं स्मर पुत्र मातुः ।।८।।**
**कालदैवक्रियेशात्म-द्रव्याङ्गास्वात्मवैकृताः । तत्संघातः प्रवाहोऽसौ त्वन्मायैतां निवारय ।।९।।**

अमुं पित्रा अर्चितं दृष्ट्वा प्राक् स्मृत्या अम्बा अब्रवीत्, (हे) प्रिय, मां मृत्यु+उन्मुखीं कुपुत्रां यः अरक्षत् अयं तु श्रीपादः।६। मादृक् सुत भवेत इति प्रतिज्ञात+सु+सिद्धये स्व+दृक् अन्य+सुत+अभावात् स्वयम् एव सुतः अभवत्।७। (हे) देव, श्रीपाद, त्वं मे सुतः न असि। (हे) हरे, मां भव+अर्णवात् उद्धर। खलु लोक+अनुसारी वर्तसे चेत् (हे) पुत्र एनं मातुः सम्बंधं स्मर।८। काल+दैव+क्रिया+ईश+आत्म+द्रव्य+अङ्ग+असु+आत्म+वैकृताः तत् संघातः प्रवाहः असौ त्वत्+माया एतां निवारय।९।

त्या श्रीगुरूंची पूजा पिताजी माधव करीत असतांना अम्बामातेची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि ती आपल्या पतीला म्हणाली, ‘प्राणनाथा, पूर्वजन्मी कुपुत्राच्या दुःखाने जीव द्यायला निघालेल्या मला वांचवणारा हाच श्रीपाद आहे.६. माझ्यासारखा पुत्र तुला होईल असा मला दिलेला वर तंतोतंत खरा करण्यासाठी, आपल्यासारखा त्रैलोक्यांत दुसरा कोणीच पुत्र न दिसल्यामुळे तो श्रीपादच आपल्या पोटी आला आहे!’७. ‘हे श्रीपाद भगवंता, तूं माझा मुलगा नाहीस, साक्षात् हरी आहेस. मला या संसारसागरांतून तार! आणि तूं लोकव्यवहारानुसारच वागणार असशील तर पुत्रा, ह्या आईचे नाते ध्यानांत ठेव! पुं नांवाच्या नरकापासून सोडवणारा तोच पुत्र म्हणवतो ना?’८. ‘१ **काळ** हा क्षोभक, २ **कर्म** (क्रिया) हे निमित्त, ३ त्यांतला फलाभिमुख झालेला अंश म्हणजे **दैव** किंवा प्रारब्ध, ४ **ईश** म्हणजे जीव, ५ **आत्मा** म्हणजे कर्माच्या संस्कारापासून घडलेला त्याचा स्वभाव, ६ **द्रव्य** म्हणजे पंच तन्मात्रा (पांच महाभूतांचे सूक्ष्म अंश), ७ **अंग** म्हणजे त्यांनी घडलेला देह, ८ **असु** म्हणजे सूत्ररूप प्राण, ९ **आत्मा** म्हणजे अहंकार आणि १० **वैकृत** म्हणजे ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, मन आणि ५ महाभूते हे सोळा पदार्थ, या सर्वांचा संघात असलेल्या

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**संन्यासी यत्कुले जातस्तरत्यपि तरिष्यति । कुलैकविंशतिः पित्रोर्दुर्गताप्यमृतं लभेत् ।।१०।।**
**जातोऽत्रायं हि संन्यासी भो मातस्तेऽथ किं वद । सम्पत्प्रजान्वितानां वः काश्यां मुक्तिर्भविष्यति ।।११।।**

**।। भगिन्युवाच ।।**

**गतिर्मे काग्रतः स्वामिन्भवसिन्धोर्बिभेम्यहम् । पापिष्ठां मोद्धर हरे सद्गुरुस्त्वं हि मे प्रभो ।।१२।।**

श्रीगुरुः उवाच। 'यत्+कुले संन्यासी जातः (तत् कुलं) तरति अपि पित्रोः (भव्या) कुल+एकविंशतिः तरिष्यति। दुर्गतां अमृतं लभते'।१०। 'अत्र अयं हि संन्यासी जातः। भो मातः अथ ते किं वद्। सम्पत्+प्रजा+अन्वितानां वः काश्यां मुक्तिः भविष्यति'।११। भगिनी उवाच। '(हे) स्वामिन्, मे अग्रतः का गतिः? अहं भव+सिन्धोः बिभेमि। (हे) हरे, पापिष्ठां मां उद्धर। (हे) प्रभो त्वं हि मे सद्गुरुः'।१२।

लिंगदेहाचा जन्ममरणरूपी प्रवाह (देहरूपी बीजापासून कर्म आणि त्या कर्मापासूनच पुन्हा अंकुरणारा देह), ही सगळी देवा, तुझीच माया आहे. ही मिथ्या असली तरी आम्हांला तिचा पार सांपडत नाही. तूंच आम्हांला हिच्यापासून सोडव.'९.

श्रीगुरु म्हणाले, 'ज्या कुळांतील कुणी पुरुष संन्यासी होतो ते कुळ तर तरतेच पण माता आणि पिता या दोन्हीच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. कुणी नरकांतही गेले असले तर त्यांना मोक्ष मिळतो.' इथे मोक्ष म्हणजे आत्यंतिक मोक्ष नसून सापेक्ष - उच्चलोकप्राप्तीरूप मोक्ष समजावा.१०. 'तुमच्या ह्या कुळांत तर हा - साक्षात् परमात्मस्वरूप मी संन्यासी झालो आहे. हे माते, आतां तुझे आणखी काय करायचे राहिले आहे? संतती आणि संपत्ती यांनी समृद्ध असे तुम्ही उभयतां काशीक्षेत्री मुक्ती पावाल!'११. श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई त्यांना विनवीत आहे. 'महाराज, माझी यापुढे काय गती होईल? या संसारसमुद्राची मला भीती वाटते. आपणच माझे सद्गुरू आहांत. तरी माझा पापिणीचा आपण उद्धार करावा!'१२.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पतिसेवनमेवैकं तारकं नापरं स्त्रियाः । पातिव्रत्यं भज ततो भवाब्धेः पारमेष्यसि ।।१३।।**
**दम्पत्योः प्राक्कृतं वैरं त्वया गौर्लत्तया हतः । अतः पत्युर्यतित्वं ते कुष्ठं चाङ्गे भविष्यतः ।।१४।।**
**इति श्रुत्वातिखिन्नाभूत्तामाश्वास्याह सद्गुरुः । वार्धक्ये तूभयं तेऽस्तु नश्येन्मे दर्शनात्कुरुक् ।।१५।।**
**इत्युक्त्वा तदनुज्ञातः सशिष्यो गौतमीं ययौ । याऽऽनीता गौतमेनेशाद् गोहत्याव्यपनुत्तये ।।१६।।**

श्रीगुरुः उवाच। 'स्त्रियाः पति+सेवनं एव एकं तारकं्। न अपरम्। पातिव्रत्यं भज। ततः भव+अब्धेः पारं एष्यसि।१३। इति श्रुत्वा (सा) अति खिन्ना अभूत्। सद्गुरुः ताम् आश्वास्य आह। 'उभयं तु ते वार्धक्ये अस्तु। मे दर्शनात् कुरुक् नश्येत्।१४। प्राक् त्वया दम्पत्योः वैरं कृतम्। (तथा च) गौः लत्तया हता। अतः ते पत्युः यतित्वं च ते अङ्गे कुष्ठत्वं भविष्यतः'।१५। इति उक्त्वा (श्रीगुरुः) तत्+अनुज्ञातः सशिष्यः गौतमीं ययौ। या गौतमेन गो+हत्या+व्यपनुत्तये ईशात् आनीता।१६।

श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतीची सेवा हाच एक तरणोपाय आहे. अन्य कोणताही नाही. तरी तूं पातिव्रत्यधर्माचे पालन कर. त्याच्याच योगाने तू हा भवसागर पार करशील.'१३. हे ऐकून रत्नाबाई घाबरून व्याकुळ झाली. 'तेव्हां तिची समजूत घालीत सद्गुरू म्हणाले, 'ह्या दोन्ही गोष्टी तुझ्या उतारवयांत होतील. तसेच तुझा कुष्ठरोग माझ्या केवळ दर्शनानेच नाश पावेल.१४. पूर्वजन्मी तू पतिपत्नीत भांडण लावलेस आणि गोमातेला लाथ मारलीस. त्या योगे तुझा नवरा संन्यास घेऊन जाईल आणि तुझ्या शरीराला कुष्ठरोग होईल.'१५. असे बोलून श्रीगुरूंनी आपली भगिनी, बंधुवर्ग, माता, पिता आणि इतर कारंजवासीय संबंधितांचा निरोप घेतला; आणि शिष्यवर्गांसह ते दक्षिण दिशेला गोदावरीला गेले, ज्या नदीला गौतम ऋषींनी आपल्या तपोबलाने भगवान् शंकरांना प्रसन्न करून स्वर्गांतून सह्याद्रि पर्वतावर आणले. त्याची कथा कूर्मपुराणांत सविस्तर आहे.

**तामेत्याप्लुत्य भगवान्मुनिं माधवसंज्ञकम् । भक्तं गतानुगतान्मुक्त्वा स्तुतस्तेनाग्रतोऽगमत् ।।१७।।**
**सशिष्योऽग्रे व्रजन्दृष्ट्वा गङ्गायां मर्तुमुत्सुकम् । विप्रं गलशिलं कञ्चिदादिष्टैस्तं कृपानिधिः ।।१८।।**
**छात्रैरुद्धारितं दीनं शूलरोगाकुलं प्रभुः । दयनीयतमं प्राह विधत्से साहसं कुतः ।।१९।।**

तां एत्य आप्लुत्य भगवान् माधवसंज्ञकं मुनिं गत+आगतात् मुक्त्वा तेन स्तुतः अग्रतो अगमत्।१७। सशिष्यः अग्रे व्रजन् गङ्गायां मर्तुं उत्सुकं कञ्चित् गलशिलं विप्रं दृष्ट्वा आदिष्टैः छात्रैः उद्धारितं दीनं शूलरोग+आकुलं दयनीयतमं कृपानिधिः प्रभुः प्राह, 'साहसं कुतः विधत्से?'१८-१९।

थोडक्यांत, ऋषींनी आपल्या स्वार्थासाठी मायेने दर्भापासून निर्माण केलेल्या गाईला गौतमांच्या साळी खाण्यासाठी प्रेरित केले. आपल्या साळींची राखण करण्यासाठी गौतमांनी तिचे निवारण केले तेव्हां त्यांच्या केवळ करस्पर्शानेच ती मायावी गाय मरण पावली. तेव्हां सर्व ऋषींनी मिळून गौतमांना ह्या गोहत्येच्या पातकापासून मुक्त होण्यासाठी स्वर्गांतून गंगा पृथ्वीवर आणण्याचे प्रायश्चित्त सांगितले. १६. त्या गोदावरी नदीवर येऊन त्यांनी स्नान केले. तिथे असलेल्या माधव नांवाच्या एका तपस्वी मुनीला त्यांनी आपल्या उपदेशाने जन्ममरणरूपी संसारांतून मुक्त केले. नंतर त्याने केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून ते पुढे निघाले.१७. शिष्यांसह गोदावरीतीराने पुढे गेल्यावर त्यांना गळ्यांत धोंडा बांधून आत्महत्येला उद्युक्त झालेला कुणी एक ब्राह्मण दिसला. आपल्या शिष्यांना सांगून दयासागर प्रभूंनी त्या पोटशूळाने तडफडणाऱ्या दीनवाण्या ब्राह्मणाला कां असे साहस करीत आहेस? असे विचारले.१८. तो ब्राह्मण उत्तरला, मला हे विचारून काय उपयोग? माझा दुःखनाश तुम्ही कराल काय? अन्नाचा वैरी असलेला हा पोटशूळ नांवाचा विकार आतां अगदी सोसवत नाही. मी कसा जगूं? या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांनी या विकाराची योगरत्नाकरांत दिलेलली लक्षणे उद्धृत केली आहेत.

**।। विप्र उवाच ।।**

**किं करिष्यसि मां पृष्ट्वा मरिष्ये शूलकातरः । कथं जीवामि रोगोऽन्न-वैर्ययं दुःसहः सदा ।।२०।।**
**प्राणोऽन्नं जीवनं चान्नं लयोऽन्नं जीवमन्नमुत् । उद्भवोऽन्नं कथं स्थेयमृतेऽन्नात्तन्मृतिर्वरम् ।।२१।।**

विप्र उवाच। मां पृष्ट्वा किम् करिष्यसि? शूलकातरः मरिष्ये। अन्न+वैरी अयं रोगः सदा दुःसहः। कथं जीवामि?२०। किं 'अन्नं प्राणः जीवनं च। अन्नं लयः। अन्नं जीवम्। अन्नं उद्भवः। अन्नात् ऋते कथं स्थेयम्? तत् मृतिः वरम्!२१।

कुशींत, जठराच्या पाठीमागे, स्तनांजवळ, पाठीच्या खालच्या भागांत यापैकीं एक वा अनेक भागांत हा शूल उत्पन्न होतो. थोडे कांही खाल्ल्याने, उलटी झाल्याने किंवा अन्नाचे पचन झाल्यावर हा शूळ शांत होतो. षाष्टिक, साळी, तांदूळ यांच्या सेवनाने हा शूल वाढतो. त्यांच्या परिणामाने उद्भवणारा हा शूल ही जाणण्याला कठिणतम अशी महाव्याधि आहे. (*'बलासः प्रच्युतस्थानात्पित्तेन सह मूर्छितः।। वायुमादाय कुरुते शूलं जीर्यति भोजने।। कुक्षौ जठरपार्श्वेषु नाभौ बस्तौ स्तनान्तरे।। पृष्ठमूलप्रदेशेषु सर्वेष्वेतेषु वा पुनः।। भुक्तमात्रेऽथवा वान्ते जीर्णान्ने च प्रशाम्यते।। षाष्टिकव्रीहिशालीनामोदनेन विवर्धते।। तत्परिणामजं शूलं दुर्विज्ञेयं महागदम्'*) १९.

स्वस्थानापासून भ्रष्ट झालेला कफ पित्ताशी संयुक्त होऊन वायूच्या साह्याने शूल निर्माण करतो. हा शूल भोजनाने कमी होतो.'अन्नगत प्राण असल्याने अन्न हेच जीवन आहे. झोपही अन्नानेच येते. औषधरूपाने जगवणारेही अन्नच आहे. वीर्यरूपाने परिणत होऊन अन्नच जन्माला कारण होते. अन्नाशिवाय कसे राहतां येईल? त्यापेक्षां मला मरणच बरे वाटते.२१. 'मी पूर्वजन्मी किंवा याच जन्मी न भुकेल्याला अन्न दिले न कांही पुण्य केले. तसेच मी कांही पुण्यकर्मही केले नाही. आईवडील, गुरू इत्यदिकांची निन्दा केली असावी.२२.

**भवान्तरेऽत्र वा नात्रं दत्तं पुण्यं न वा कृतम् । गोविप्रग्रासोऽपहृतो निन्दिताः पितरौ गुरुः ॥२२॥**
**नेशोऽर्चितो वातिथयो हापिता धिक्कृता द्विजाः । मिष्टान्नं पितरौ त्यक्त्वा साकं भुक्तं स्त्रिया मया ॥२३॥**
**इति भात्यन्यथा नेदृक्कष्टं भो मय्युपस्थितम् । कृतो नान्योपकारो भूभारो मोघभवोऽभवम् ॥२४॥**
**मा भीर्दास्येऽन्नपथ्यं ते दिव्यौषधमहं भिषक् । इत्युक्त्वा विरते तस्मिन्द्विज एकः समाययौ ॥२५॥**
**सायंदेवाभिधः काञ्ची-वासी कौंडिण्यगोत्रजः । सुदीनो यवनाधीनस्तमाह प्रणतं गुरुः ॥२६॥**

(मया) भव+अंतरे अत्र वा अन्नं न दत्तं न वा पुण्यं कृतम्। (वा) गो+विप्र+ग्रासः अपहृतः। पितरौ, गुरुः (वा) निन्दिताः।२२। ईशः न अर्चितः वा अतिथयः हापिताः (वा) द्विजाः धिक्कृताः। मया पितरौ त्यक्त्वा स्त्रिया साकं मिष्टान्नं भुक्तम्।२३। इति भाति। भोः (गुरो) अन्यथा ईदृक् कष्टं मयि न उपस्थितम्। (मया) अन्य+उपकारः न कृतः। (तस्मात् अहं) भू+भारः मोघभवः अभवम्।'२४। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अहं भिषक्। ते अन्नपथ्यं दिव्य+औषधं दास्ये।' इति उक्त्वा तस्मिन् (श्रीगुरौ) विरते एकः द्विजः समाययौ।२५। सायंदेव+अभिधः काञ्ची+वासी कौण्डिण्य+गोत्रजः यवन+अधीनः सुदीनः। तं प्रणतं गुरुः प्राह।२६।

### ॥ श्रीगुरुरुवाच ॥

ईश्वराचे पूजनसुद्धां केले नाही; (माध्यान्हकाळी) अतिथीला हांकलले असावे; ब्राह्मणांचा अपमान केला असावा. आईवडिलांना सोडून मी बायकोबरोबर मिष्टान्न खाल्ले असावे.२३. अहो, असे नसते तर मला हे दुर्धर दुःसह कष्ट झालेच नसते. कसलाही परोपकार न केल्याने मी भूमीला भारभूत झालो आहे. हा माझा जन्म व्यर्थ आहे.'२४. श्रीगुरु त्याला म्हणाले, 'भिऊं नकोस! मी वैद्य आहे. तुला अन्न पचावे असे दिव्य औषध मी तुला देतो. असे श्रीगुरू बोलतात तोच त्यांच्याकडे एक ब्राह्मण आला.२५. सायंदेव नांवाचा तो कौण्डिण्य गोत्रीय ब्राह्मण उत्तरकांची(कडगंची)चा राहणारा होता आणि म्लेच्छाची चाकरी करीत होता. त्या विनम्र ब्राह्मणाने श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां त्याला श्रीगुरू म्हणाले.२६.

**मर्तुमिच्छति रुग्णोऽयं व्यथितो दिव्यमौषधम् । ददम्यस्मै त्वमपि ब्रह्मन्पथ्यं स्वाद्वन्नमर्पय ॥२७॥**

**॥ सायंदेव उवाच ॥**

**मासा पक्षेण वाल्पान्नं भुङ्क्त आत्यन्तिकीं व्यथाम् । स तदाप्नोत्यन्नदानाद् भवेद्धत्येति भाति मे ॥२८॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**भिषक्तमोऽस्मि नाशङ्क्यं सापूपं देहि माषयुक् । परमान्नं च पथ्यं मा भीर्जाने रुक्प्रतिक्रियाम् ॥२९॥**

अयं रुग्णः व्यथितः मर्तुम् इच्छति। तस्मै दिव्यं औषधं दद्मि। '(हे) ब्रह्मन्, त्वं अपि पथ्यं स्वादु अन्नं अर्पय।'२७। सायंदेवः उवाच। सः मासा पक्षेण वा अल्प+अन्नं भुङ्क्ते। तदा आत्यन्तिकीं व्यथां आप्नोति। अन्न+दानात् हत्या भवेत् इति मे भाति'।२८। श्रीगुरुः उवाच। 'भिषक्+तमः अस्मि। न आशंक्य स+अपूपं माषयुक् पथ्यं परमान्नं च देहि। मा भीः, रुक्+प्रतिक्रियां जाने।'२९।

'हा रोगी अत्यंत त्रासून मरायला निघाला आहे. मी ह्याला दिव्य औषध देतो आहे. तूंसुद्धां त्याला पथ्यकर गोड अन्न दे.'२७. सायंदेव उत्तरला, 'ह्याने महिन्या-पंधरवड्याला कधी तरी थोडेसेही अन्न खाल्ले तरी त्याला भयंकर वेदना होतात. मी अन्न दिले तर न जाणो, ह्याला कांही झाले तर मला ब्रह्महत्येचे पाप लागेल अशी मला भीती वाटते.'२८. श्रीगुरू म्हणाले, 'मी उत्तम वैद्य आहे. ईश्वरस्वरूप असल्याने श्रीगुरूंनी स्वतःला **भिषक्तम** (ऋग्वेद २:३३:४) म्हणणे योग्यच होय. मनांत कांहीही शंका न आणतां अपूप, उडदाचे वडे, पायस इत्यादींसह चारी ठाव भोजन ह्याला दे. घाबरूं नकोस, मी रोगाचा प्रतिकार उत्तम प्रकारे जाणतो.'२९. सायंदेवाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार करायचे मान्य केले आणि तो त्यांना म्हणाला, 'आपणही आपल्या शिष्यांसह माझ्या घरी येऊन भिक्षेचा स्वीकार करावा. मी आपला शिष्य होत आहे. तरी हे सद्गुरो, मी आपल्याला शरण आलो आहे, आपण मला मार्गदर्शन करा.'३०.

**।। सायंदेव उवाच ।।**

**तथा कुर्यामपि भवान्सशिष्योऽङ्गीकरोतु मे । भिक्षां गृहेऽस्मि ते शिष्यः प्रपन्नं शाधि मां गुरो ।।३०।।**
**इत्युक्तिं सौष्ठवौदार्य-रम्यां श्रुत्वा तथेति तम् । ऊचे ततः सशिष्यं तं द्विजो निन्ये निजालयम् ।।३१।।**
**चित्रितेऽलङ्कृते गेहे रंगवल्ल्यादि रञ्जिते । स्वासनेषूपवेश्यैतानुपतस्थेऽङ्गनान्वितः ।।३२।।**

सायंदेव उवाच। 'तथा कुर्याम्। सशिष्यः भवान् अपि मे गृहे भिक्षां अङ्गीकरोतु। ते शिष्यः अस्मि। (हे) गुरो, प्रपन्नं मां शाधि।'३०। इति सौष्ठव+औदार्य+रम्यां उक्तिं श्रुत्वा (श्रीगुरुः) तं 'तथा' इति ऊचे। द्विजः निजालयं निन्ये।३१। चित्रिते अलंकृते रङ्गवल्ल्यादि रंजिते गेहे सु+आसनेषु उपवेश्य अङ्गना+अन्वितः (सायंदेवः) उपतस्थे।३२।

**संन्याशाचे पूज्यत्व -** हे त्याचे औचित्यापूर्ण आणि उदार बोलणे ऐकून श्रीगुरूंनी त्याला होकार दिला. मग तो सायंदेव त्या सर्वांना आपल्या घरी घेऊन गेला.३१. नयनरम्य चित्रांनी, तोरण-पताकांनी तसेच आकर्षक रांगोळ्यांनी सजविलेल्या त्या घरी श्रीगुरूंना उत्तम आसनावर बसवून त्यांची परमेश्वरभावाने पूजा केली. श्रीगुरू साक्षात् भगवंत आहेत हे ज्ञान नसतांनाही, त्यांच्या वेदज्ञानाने, संन्यासित्वामुळे सायंदेवाच्या मनांत हे ईश्वररूप आहेत अशी बुद्धी उपजली. ही भगवद्गीतेच्या (१५:१) प्रतिपादनाशी जुळणारी आहे. ('वरती मुळे आणि खाली शाखा असलेल्या, वेद ज्याची पाने आहेत अशा अक्षय अश्वत्थाला जाणणारा वेदवेत्ता होय.') श्राद्धाच्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रांतही (२:१५) हेच सांगितले आहे. 'जेवढ्या म्हणून देवता आहेत त्या सर्व वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाच्या ठायी वसतात. त्यासाठी वेदज्ञ ब्राह्मणांना रोज नमस्कार करावा, त्यांचा आदर करावा, त्यांच्याशी अश्लील भाषण करूं नये. अशानेच देवता संतुष्ट होतात.' वित्त, दारा (पुत्र) आणि लोक या सर्वांच्या आसक्तीचा (एषणांचा) त्याग करून दण्डादि धारण करून भिक्षावृत्तीचा अंगीकार करणारा संन्यासी होतो. अशा संन्याशाला शास्त्रांनी साक्षात् विष्णूंचेच स्वरूप मानले आहे. असा यति ज्या घरी जेवतो तिथे साक्षात् विष्णूच जेवतात. ह्या ठिकाणी तर श्रीगुरू ब्रह्मस्वरूपच असल्याने हा भ्रम जरी मानला तरी संवादी भ्रमच होतो.३२.

**सूपचारैः प्रपूज्येशं रौद्रैर्मन्त्रैश्च पौरुषैः । नीराज्य श्रद्धया गीत-स्तोत्रादिभिरतोषयत् ।।३३।।**
**गुरुपादोदकं तीर्थं भक्त्या संपूज्य मुक्तिदम् । पीत्वैनोहारि सस्त्रीकः शिष्यान्सर्वानपूजयत् ।।३४।।**
**अन्नं चतुर्विधं स्वादु सुरसं गव्यसंयुतम् । प्रादात्प्रकामं सर्वेभ्यो मधुरोक्त्यादरेण सः ।।३५।।**

ईशं सु+उपचारैः रौद्रैः पौरुषैः च मन्त्रैः श्रद्धया प्रपूज्य नीराज्य गीत+स्तोत्रादिभिः अतोषयत्।३३। एनो+हारी मुक्तिदं गुरु+पाद+उदकं तीर्थं सस्त्रीकः भक्त्या संपूज्य पीत्वा सर्वान् शिष्यान् अपूजयत्।३४। सः चतुर्विधं स्वादु सुरसं गव्य+संयुतं अन्नं सर्वेभ्यो प्रकामं मुधर+उक्त्या आदरेण प्रादात्।३५।

त्याने उत्तम उपचारांनी, शतरुद्रीय आणि पुरुषसूक्त यांच्या मंत्रांनी श्रद्धापूर्वक सद्गुरूंचे पूजन केले, आरती केली आणि गीत, स्तोत्रे इत्यादींनी त्यांना प्रसन्न केले.३३. गुरुगीतेत *'शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः।'* असे गुरुचरणांच्या तीर्थाचे वर्णन आहे. अशा पापविनाशी आणि मुक्तिप्रद तीर्थाचे सपत्नीक भक्तिभराने षोडशोपचार पूजन करून सायंदेवाने ते प्राशन केले. तसेच सर्व शिष्यांचीही त्याने यथायोग्य पूजा केली.३४. यानंतर सायंदेवाने सर्वांना भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चारी प्रकारचे, दूध, दही, तूप, लोणी यांनी युक्त, मधुर अन्न आदराने आणि गोड (आर्जवी) भाषणासहित यथेच्छ खाऊं घातले. ते सहाही रसांनी चविष्ट केले होते. आयुर्वेदांत भोजन गोड असावे असे म्हटले आहे. तसेच गीतेनेही (१७:८) रसयुक्त, स्निग्ध, स्थिर आणि हृद्य आहाराला सात्त्विक म्हटले आहे. चतुर्विध अन्न - दांतानी तुकडे करून खाल्ले जाते ते अपूपादि **भक्ष्य**, न चावतां नुसते गिळले जाते ते पायसादि **भोज्य**, जिभेने चाटून खाल्ले जाणारे गूळ वगैरे **लेह्य**, दांतानी चोखून रस घेऊन नीरस भाग टाकून जे सेवन केवे जाते ते ऊस वगैरे **चोष्य**.३५.

**भुक्त्वान्नं गुरुपङ्क्त्यां स भेजे रुग्णोऽप्यनामयम । नेदं चित्रं हि यद्भक्ता घ्नन्त्युद्भवमहारुजम् ।।३६।।**
**स ततोऽसारसंसार-निर्विण्णो गुरुदर्शनात् । भूत्वा क्षणादुदासीनः सर्वतोऽभजदच्युतम् ।।३७।।**
**द्विजोऽपि भुक्तानाचान्तान्सूपविष्टान्सुगन्धिभिः । पत्सैवनैश्चास्यवासैस्तोषयित्वाऽब्रवीद्गुरुम् ।।३८।।**
**अङ्घ्र्यब्जवन्दनात्तेऽद्य सफलं जन्मकर्म मे । पितरोनुग्रहान्मुक्तास्तत्कृतार्थोऽस्मि निर्मलः ।।३९।।**

सः रुग्णः गुरु+पंक्त्यां अन्नं भुक्त्वा अनामयं भेजे। इदं चित्रं न हि यत्+भक्ताः उद्भव+महा+रुजं घ्नन्ति।३६। ततः असार+संसार+निर्विण्णः सः गुरुदर्शनात् (एव) क्षणात् उदासीनः सर्वतः अच्युतं अभजत्।३७। द्विजः अपि भुक्तान् आचान्तान्, सु+उपविष्टान् सुगन्धिभिः पत्+सेवनैः आस्य+वासैः तोषयित्वा गुरुं अब्रवीत्।३८। अद्य ते अंघ्रि+अब्ज+वंदनात् मे जन्म+कर्म सफलम्। अनुग्रहात् पितराः मुक्ताः। तत् निर्मलः कृतार्थः अस्मि।३९।

तो रोगी ब्राह्मणही श्रीगुरूंच्या पंक्तीला अन्न ग्रहण करून निरोगी झाला. श्रीगुरूंच्या पंक्तीला म्हणजे त्यांच्या शिष्यांच्या पंक्तीला असा अर्थ घ्यावा; किंवा श्रीगुरूंचे शिष्य सगळे संन्यासीच, अर्थात् गुरुस्थानीच असल्याने गुरूंची पंगत असाही अर्थ घेतां येईल. तसेच गरूंच्या पंक्तीला जेवला ह्यांत त्या रुग्णाचा समावेश श्रीगुरूंच्या शिष्यवर्गांत झाल्याचीही सूचना आहे. तो पोटशूळ बरा झाला यांत आश्चर्य कांहीच नाही; कारण श्रीगुरूंचे भक्त जन्ममरणरूपी महारोगाचाही नाश करतात.३६. केळीच्या खुंटासारख्या निस्सार संसारापासून विरक्त झालेला तो रोगमुक्त ब्राह्मण केवळ श्रीगुरूंच्या दर्शनानेच तत्काळ उदासीन झाला आणि सर्वभावे सच्चिदानंदस्वरूपापासून कधीही च्युत न होणाऱ्या सद्गुरूंचा भक्त झाला.३७. मग सायंदेव ब्राह्मणाने भोजन केरून आंचवलेल्या सर्वांना छानशा आसनांवर बसवून सुगंधी पदार्थ अर्पण केले. तसेच मुखवासही दिला. विडा (तांबूल) संन्याशांना निषिद्ध असला तरी विलायची किंवा लवंग सेवन करतां येते. मग त्याने श्रीगुरूंची प्रार्थना केली.३८. 'श्रीगुरुमहाराज! आपल्या चरणकमलांना वंदन केल्याने माझा जन्म आणि माझे सर्व कर्म सफल झाले आहेत. आपल्या कृपानुग्रहाने माझे सर्व पितरही मुक्त झाले आहेत. यामुळे आत्मज्ञानाला आड येणारी सर्व पापे नाश पावून मी निर्मल झालो आहे व मी कृतकृत्य झालो आहे.३९.

**गङ्गा पापं विधुस्तापं दैन्यं कल्पतरुर्हरेत् । वायुस्तूलमिवैतत्ते दर्शनं हरति त्रयम् ।।४०।।**
**साक्षी सर्वान्तरस्थस्त्वं परात्माऽधोक्षजोऽमलः । नृरूपेणावतीर्णोऽसि साधूंस्त्रातुमजोऽव्ययः ।।४१।।**
**देहि मे तेऽमलं दास्यं श्रद्धोपेतं कुलाय च । याचेऽदो भगवन्नेको ममाधिस्तन्निशामय ।।४२।।**
**यन्निघ्नोऽस्मि स वै हिंस्रो यवनो हन्ति भूसुरम् । प्रत्यब्दमाह्वयत्यद्य तदर्थमिति शुश्रुम ।।४३।।**

गङ्गा पापं, विधुः तापं, कल्पतरुः दैन्यं हरेत्। ते दर्शनं त्रयम् अपि वायुः तूलं इव हरति।४०। साक्षी सर्व+अंतरस्थं अधोक्षजः अमलः अजः अव्ययः त्वं साधून् त्रातुं नृ+रूपेण अवतीर्णः असि।४१। मे कुलाय च ते अमलं श्रद्धा+उपेतं दास्यं देहि अदः याचे। भगवन्, मम एकः आधिः निशामय।४२। (अहं) यत्+निघ्नः सः हिंस्रः यवनः प्रत्यब्दं भूसुरं हन्ति वै। तदर्थं अद्य (मां) आह्वयति इति शुश्रुम।४३।

गंगा पाप, चंद्रमा ताप आणि कल्पवृक्ष दैन्य दूर करतात. आपले दर्शन मात्र या तिन्हींना, वाऱ्याने कापूस उडवून लावावा, तसे पळवून लावतात.'४०. 'सर्वांच्या अंतर्यामी साक्षित्वाने राहणारा परमात्मा तूं आहेस. **अक्ष** म्हणजे नेत्रादि इंद्रियांना **अधः** म्हणजे अंतर्मुख केल्याने जो चित्तांत प्रकटतो तो अधोक्षज तूंच आहेस. रागद्वेषादि चित्ताचे मल धुऊन टाकणारा जन्ममरणादि विकाररहित अक्षय पुरुष असूनही तूं साधूच्या परित्राणाकरिता मानुष रूपाने अवतरला आहेस.४१. मला आणि माझ्या वंशाला आपले अव्यभिचारी आणि श्रद्धापूर्ण दास्य द्यावे हेच मागणे आहे. भगवंता, माझ्या मनाला एक घोर चिंता लागलेली आहे ती आपण ऐकावी.४२. माझा स्वामी असलेला क्रूर म्लेच्छ प्रतिवर्षी एका ब्राह्मणाला ठार करतो. त्यासाठीच त्याने आज मला बोलावले आहे असे आमच्या कानांवर आले आहे.४३. श्रीगुरू सायंदेवाला म्हणाले, भिऊं नकोस! तो यवन कितीही निष्ठुर असूं दे, तूं बिनधास्त त्याच्याकडे जा. तो तुझा सत्कारच करील. मग आनंदाने तूं परत ये. तोंपर्यंत मी इथेच थांबतो. चिंता सोड.४४.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**मा भीः क्रूरमपीदानीं यवनं याह्यसंशयम् । मुदैष्यस्यर्चितस्तेन तावत्तिष्ठामि मा शुचः ।।४४।।**
**इत्याकर्ण्यापशङ्कं स ययौ यवनमञ्जसा । शस्त्रैर्विप्रश्छिनत्तीति भ्रान्तोऽरं यवनस्तदा ।।४५।।**
**तं तुष्ट्वा वस्त्रभूषार्थैः प्राह गच्छ सुखं द्विज । सायंदेवोऽपि वीताधिर्हृष्टः श्रीगुरुमाययौ ।।४६।।**
**सर्पोऽप्यद्याद्विराजोऽर्भं हरेर्वेभो गुरुप्रियम् । न क्षमोऽप्यन्तको द्रष्टुं यवनः किमुताल्पकः ।।४७।।**
**दासोऽसीष्टं लभेत्ते मे द्व्यष्टाब्दैर्दर्शनं भवेत् । द्विजेत्युक्त्वा वैद्यनाथं गत्वान्तर्दध ईश्वरः ।।४८।।**

श्रीगुरुः उवाच। मा भीः। क्रूरं अपि यवनं असंशयं याहि। तेन अर्चितः मुदा एष्यसि। तावत् तिष्ठामि। मा शुचः।४४। इति आकर्ण्य सः अपशङ्कं अञ्जसा यवनं ययौ। तदा शस्त्रैः विप्रः (मां) छिनत्ति इति अरं भ्रान्तः यवनः।४५। तं वस्त्र+भूषा+अर्थैः तुष्ट्वा प्राह, (हे) द्विज, सुखं गच्छ! सायंदेवः अपि वीत+आधिः हृष्टः श्रीगुरुं आययौ।४६। विराजः अर्भं सर्पो अद्यात् अपि हरेः वा (अर्भं) इभो (अद्यात्)? गुरु+प्रियं अंतकः अपि द्रष्टुं न क्षमः। किं उत अल्पकः यवनः?४७। (हे) द्विज, (मम) दासः असि। ते इष्टं लभेत्। द्वि+अष्ट+अब्दैः मे दर्शनं भवेत्। इति उक्त्वा वैद्यनाथं गत्वा ईश्वरः अन्तर्दधे।४८।

हे श्रीगुरूंचे आश्वासनपर भाषण ऐकून तो सायंदेव निःशंक मनाने लगेच त्या यवनाकडे गेला. त्या वेळी त्या यवनाला अशी गाढ भ्रांती झाली की एक ब्राह्मण आपले शस्त्राने तुकडे करतो आहे.४५. त्यामुळे प्रभावित होऊन त्याने सायंदेवाला वस्त्रे, अलंकार आणि द्रव्य देऊन सन्मानित केले आणि म्हणाला, अहो विप्रवर, आपण सुखाने घरी जा. त्याबरोबर मरणभय दूर झाल्याने हरखलेला सायंदेव श्रीगुरूंकडे परतला.४६. गरुडाच्या पिलाला कदाचित् सापही खाऊं शकेल किंवा सिंहाच्या छाव्याला हत्तीही गिळेल; परंतु गुरुभक्ताकडे पाहण्याचीही साक्षात् यमाचीही बिशाद नाही. मग त्या क्षुद्र यवनाची काय कथा?४७. यवनाकडून परतलेल्या सायंदेवाची आपल्याबरोबर येण्याची उत्सुकता जाणून श्रीगुरू म्हणाले, हे ब्रह्मश्री, तूं माझा दास आहेस. तुला तुझे अभीप्सित मिळेल. आणखी सोळा वर्षांनी तुला माझे

**ईदृश्योऽलौकिका लीलाः कृता भक्तिविधित्सया । भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु ।।४९।।**
**लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः । लौकिकानन्दजनकां चमत्कृतिमिहाकरोत् ।।५०।।**
**हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम् । भजनादेव निर्धूत-मला यान्ति मुमुक्षुताम् ।।५१।।**
**ततोऽभ्यासाच्च वैराग्यात्तं ध्यायन्त उपासते । महाप्रसादोऽनेनैव लभन्ते सद्गुरोर्नताः ।।५२।।**

ईदृश्याः अलौकिकाः लीलाः भक्ति+विधित्सया कृताः। कथं अपि लोका मां भजेयुः इति तु अस्य आशयः।४९। अनेन हेतुना तत् लोका भगवत्+पदं भजन्ति। भजनात् एव निर्धूत+मलाः मुमुक्षुतां यान्ति।५०। लोके प्रति+उपकारित्वं समीक्ष्य भगवान् विभुः इह लौकिक+आनंद+जनकां चमत्कृतिं अकरोत्।५१। ततः अभ्यासात् वैराग्यात् च तं ध्यायन्तः उपासते। अनेन एव नताः सद्गुरोः महाप्रसादः लभन्ते।५२।

दर्शन होईल. असे आश्वासन त्याला देऊन श्रीगुरू (परळी) वैद्यनाथाला जाऊन गुप्तपणे राहिले.४८. अशा अलौकिक दिव्य लीला श्रीगुरूंनी भक्तिमार्गाच्या संस्थापनेसाठी केल्या. त्यांचा हेतु हाच की स्नेहाने वा लोभाने, कशाही प्रकारे लोकांनी आपली भक्ती करावी.४९. आपल्या (भगवंताच्या) भजनावीण लोकांना मोक्षाची योग्यता येणार नाही; आणि त्यांना तर भजनांत अजिबातच रस नाही. त्यामुळे त्यांच्या सांसारिक इच्छा पुरवून त्यांच्यांतील प्रत्युपकाराची भावना जागवावी आणि अशा रीतीने तरी त्यांना आपल्या भक्तीला लावावे यासाठीच त्यांना सुखविणारे चमत्कार तो सर्वव्यापी भगवंत करीत असतो.५०. या निमित्ताने ते लोक सगुण परमात्म्याची अर्चन, वन्दन (*श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।*) आदि नऊ प्रकारे (१) **सकाम भक्ती** करतात. या भक्तीच्या प्रभावाने त्यांच्या चित्तांतील मल नाहीसे होऊन त्यांच्या ठिकाणी मुक्तीची इच्छा (२. **मुमुक्षा**) निर्माण होते.५१. त्यानंतर मुक्तीसाठी प्रयत्नशील झालेला तो (३) **साधक** अभ्यास आणि वैराग्य धारण करून त्या भगवंताचे चिंतन करीत त्याची उपासना करतो. उपासना याचा अर्थ तत्परता. संसारांत जसे आपण ‘मी येतो, मी

**ऐक्यज्ञानं तदा लब्ध्वा महावाक्येन चात्मनोः । शान्तिं विनिहिताविद्यास्तत्संस्थां यान्ति ते ध्रुवाम् ।।५३।।**
**प्रसन्नात्मानः प्रशान्ता निर्बन्धा द्वैतवर्जिताः। स्वात्मारामाश्चरन्त्यत्र जडोन्मत्तपिशाचवत् ।।५४।।**

तदा ते महावाक्येन च ऐक्यज्ञानं लब्ध्वा वि+नि+हता+अविद्याः तत्+संस्थां ध्रुवां शान्तिं यान्ति।५३। द्वैतवर्जिताः निर्बन्धाः प्रसन्न+आत्मानः प्रशांताः स्वात्मारामाः अत्र जड+उन्मत्त+पिशाच+वत् चरन्ति।५४।

जातो, हा माझा देह आहे, हे माझे घर आहे' असा सतत आस्थेने व्यवहार करतो आणि मग त्याचाच अध्यास दृढ होत जातो. त्याचप्रमाणे जर 'मी ब्रह्म आहे' अशी आस्था निरंतर ठेवून त्याचप्रमाणे व्यवहार करण्याचा अभ्यास करणे हीच उपासना. ह्या उपासनेने आपण देह आहोत अशा ज्ञानाचा निरास करणारे (देहात्मज्ञानबाधक), देहात्मज्ञानासारखे 'मी ब्रह्म आहे' असे आत्मज्ञान सुलभ होते. ह्याच **उपासने**ने (४) सद्गुरूंचा महाप्रसाद होतो.५२. म्हणजेच शब्दज्ञान आणि अपरोक्षज्ञान यांत निष्णात असलेले कृपासागर सद्गुरू महावाक्याचा उपदेश (५. **श्रवण**) करतात. 'तो तूं आहेस' या महावाक्यातील भागत्यागलक्षणेच्या लक्षित अर्थाच्या अनुसंधानात्मक (५) **मनना**ने आणि (६) **निदिध्यासना**ने अविद्येचा तिच्या कार्यासहित (प्रपंचासहित), विशेष (**वि**) आणि (**नि**) समूळ नाश (**हता**) करून साधक-भक्त प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अखंडरस ऐक्य अनुभवतो. म्हणजेच अपरोक्षज्ञानाच्या प्राप्तीने स्वात्मरूपांत विलीन होतो. आणि त्या आत्मज्ञानांतील पुनरावृत्तिरहित, निर्वाणलक्षण शांती पावतो. निरतिशय आनंदघन चैतन्यांत निरंतर डुबून राहतो.५४.

शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यांत (१:१:४) स्पष्ट केल्याप्रमाणे ब्रह्मभावांत स्थिरावल्यावर तो पूर्वीसारखा संसारी राहत नाही; पूर्वीसारख्या संसारी माणसाला ब्रह्मज्ञान झालेले नसते. जीवन्मुक्ताला आपले असे कुणी राहत नाही वा तो कुणाचाही राहत नाही. यावर कुणी म्हणतील की, 'मग लौकिक, वैदिक सर्वच कर्मांचा लोप होऊन त्याला प्रत्यवाय

दोष लागणार नाही का?' पण त्याला 'मीच ब्रह्म आहे' असा आनंदपूर्ण अद्वैत बोध झाला असल्याने तो कृतकृत्य होतो (परमहंसोपनिषत् ९). आत्मा आणि परमात्मा यांच्या एकत्वाच्या ज्ञानाने होणारा भेदाचा भंग हीच संध्या तिचे आत्मसमाधीतच आचरण करावे असे उपनिषदाचे प्रतिपादन आहेत. श्रीमद्भगवद्गीतेतही (३:१७) म्हटलेले आहे, जो आत्म्यांतच रमलेला आहे आणि आत्मानंदाने तृप्त होऊन आत्म्यामध्येच संतुष्ट आहे त्याला कांहीही करावयाचे राहत नाही.' योगवासिष्ठांतच (५:७७:२९) जीवन्मुक्ताची लक्षणे सांगतांना सूर्य शीतल झाला, चंद्रमंडल उष्ण झाले किंवा अग्नीच्या ज्वाळा खालच्या दिशेने जरी पसरल्या तरी जीवन्मुक्ताला आश्चर्य वाटत नाही असे सांगितले आहे. *('अपि शीतरुचावर्के उष्णे पीयूषमण्डले। अप्यधःप्रसरत्यग्नौ जीवन्मुक्तो न विस्मयी।।')* साहजिकच तो इतरांना जड (मंदमति), उन्मत्त (वेडा) किंवा पिशाच यांच्यासारखा वाटतो. वर वर्णन केल्यानुसार त्याच्या मनांतील द्वैतभावच लोपलेला असल्याने ज्ञानाच्या पूर्वीचे प्रापंचिक व्यवहार लोप पावतात.

*'योगभूमिः - शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता। विचारणा द्वितीया स्यात्तृतीया तनुमानसा। सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यादसंसक्तस्तु पञ्चमी। पदार्थाभावनी षष्ठी सप्तमी तुर्यका स्मृता। आद्यत्रयं जागरतं साधकस्य प्रकीर्तितम्। तुर्या स्वप्नः साधकोऽत्र प्राज्ञैर्ब्रह्मवदुच्यते। निद्रा तु पञ्चमी ब्रह्मवद्वरोऽत्र उच्यते। षष्ठी तु गाढनिद्रा स्याद्वरीयानत्र स स्मृतः। ज्ञेयं परत उत्थानमस्य भावितचेतसः। अन्त्या तुरीयात्र ब्रह्मवद्वरिष्ठो महामतः। स्वतो वा परतो वाऽस्य व्युत्थानं नैव कर्हिचत्, इति।'*

**योगभूमिका -** यांनाच ज्ञानभूमिका असेही म्हणतात, योगवासिष्ठाच्या उत्पत्तिप्रकरणांत ११८व्या सर्गांत वर्णिलेल्या आहेत. क्षणभंगुर, आभासमात्र, पराधीन ऐंद्रिय उपभोगांचा वीट येऊन नित्य, शाश्वत, निरतिशय आणि स्वतंत्र अशा स्वात्मसौख्याची इच्छा होणे आणि त्यासाठी शास्त्र आणि सतंसंग यांच्याकडे प्रवृत्ती होणे ही (१) **शुभेच्छा** नांवाची

पहिली ज्ञानभूमिका होय. इंद्रियांपासून विरक्त होऊन शास्त्रांचा अभ्यास करणे, सज्जनांच्या संगतीत सदाचारपूर्वक श्रवण-मनन घडूं लागले की दुसरी (२) **विचारणा** नांवाची भूमिका सिद्ध झाली असे समजायला हरकत नाही. या दोन भूमिकांचा अभ्यास प्रगाढ होऊन इंद्रिये विषयापासून परावृत्त होऊं लागली, अनासक्ती मनांत स्थिरावली की तिसरी (३) **तनुमानसा** ही भूमिका प्राप्त होते. पहिल्या तीन भूमिकांत साधकाची जागृतावस्था असते. त्याला बाह्य जगताचे पूर्ण भान असते. या तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासाने विषयांपासून पूर्णपणे विरक्त झालेले मन (वशीकरणसंज्ञा वैराग्य) सच्चिदानंद आत्मस्वरूपांत स्थिर झाले की चौथ्या (४) **सत्त्वापत्ती** नांवाच्या भूमिकेवर योगी आरूढतो. ह्या भूमिकेतील योगी ब्रह्मवित् (ब्रह्मज्ञानी) म्हणविला जातो. ह्या तुर्या किंवा समाधी अवस्थेत साधकाला बाह्य जग स्वप्नवत् होते. ही ब्रह्मज्ञानाची पहिली अवस्था आहे. या चार भूमिकांच्या दृढ अभ्यासाने साधक आत्मस्वरूपांत रमून जातो आणि बाह्य जगताचे त्याला भान नसते. हीच पांचवी (५) **असंसक्ती** भूमिका आहे. ही साधकाची निद्रा आहे. ह्या योग्याला ब्रह्मविद्वर असे म्हणतात. सहाव्या भूमिकेत योगी बाह्य जगताचा संबंध संपूर्णपणे तुटल्याने योग्याला जगांतील पदार्थांचे भान राहत नाही. ह्या (६) **पदार्थाभावनी** स्थितीतील योग्याला (**ब्रह्मविद्वरीयान्**) समाधीतून उठविण्यासाठी दुसऱ्या कुणाच्या तरी प्रयत्नांची आवश्यकता असते (**परतो व्युत्थान**). यानंतरची चरम ज्ञानभूमिका (सातवी किंवा ज्ञानी पुरुषांची चौथी श्रेणी - **तुरीया**) प्राप्त झालेला योगी अखंड समाधीत मग्न असतो. तिच्यांतून तो स्वतःच्या वा दुसऱ्याच्या प्रयत्नांनीही भानावर येत नाही. हा ब्रह्मविद्वरिष्ठ होय.

**स्पर्शेक्षाकीर्तनादीनां सद्गुरोर्महिमा त्वियान् । स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वापि धत्ते यत्र मनोऽचलम् ।।५५।।**
**तत्सारूप्यं स पेशस्कृद्ध्यानात्कीट इवैत्यरम । इत्याद्या मार्गणोपाया हरेः स्युः सुलभा नृणाम् ।।५६।।**
**मृग्योऽसौ पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः । नानुमानैरतो युक्त आत्मैवात्मगुरुः किल ।।५७।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**भूतेशोऽन्तर्दधे कस्मात्तेजस्वी भक्तवत्सलः । शिष्यास्तस्थुस्तदा कुत्र तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।५८।।**

सद्गुरोः स्पर्श+ईक्षा+कीर्तन+आदीनां इयान् महिमा। स्नेहात् द्वेषात्, भयात् वा अपि यत्र मनः अचलं धत्ते।५५। स पेशस्कृत्+कीट इव तत्+सारूप्यं एति। इति+आद्याः हरेः मार्गण+उपायाः नृणां सुलभाः।५६। असौ पुरुषेण एव बुद्धि+आदि+गुण+हेतुभिः मृग्यः। न अनुमानैः। अतः आत्मा एव आत्म+गुरुः युक्तः किल।५७। नामधारक उवाच। तेजस्वी भक्तवत्सलः भूतेशः कस्मात अन्तर्दधे? तदा शिष्याः कुत्र तस्थुः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।५८।

एवढा सद्गुरूंच्या स्पर्श, दर्शन, कीर्तन इत्यादिकांचा महिमा आहे. व्रजगोपिकांप्रमाणे प्रेमाने, शिशुपालादिकांप्रमाणे द्वेषाने किंवा कंसादींप्रमाणे भयाने जिथे कुठे कुणीही अभ्यास-वैराग्यांनी मन स्थिर करील,५५. त्याला ध्येय वस्तूचे सारूप्य प्राप्त होते. कुंभारीण माशीच्या चिंतनाने जसे अळीलासुद्धां पंख फुटून तिची कुंभारीण माशीच होते तसेच हे आहे. असे हे परमात्म्याच्या प्राप्तीचे उपाय मानवमात्रांना सहज उपलब्ध आहेत. यासाठी जाती, वय, लिंग इत्यादींचा कांही नियम नाही.५६. ह्या भगवंताचा नरजन्मांतच बुद्धी इत्यादि साधनांनी शोध घ्यायचा आहे. मात्र केवळ तर्काने तो सांपडणार नाही. यासाठी आपणच आपले गुरू असतो हे खरोखर योग्यच आहे.५७. नामधारक विचारतात - तेजःपुंज आणि भक्तवत्सल असे भगवान कां बरे गुप्त झाले? आणि मग शिष्यवर्ग कुठे राहिला? हे सर्व जाणण्यास मी सादर आहे.५८.

## ।। सिद्ध उवाच ।।

**सर्वे शिष्या भविष्याम इति मत्वात्र यान्त्यतः । मत्वा स्थेयं रह इति छात्रान्सद्गुरुरब्रवीत् ।।५९।।**
**लब्ध्वा द्विजत्वं संस्कारैर्ब्रह्मचारी पठन्त्रयीम् । द्वादशाब्दं कृती सूत्र-मेखलाजिनदण्डधृक् ।।६०।।**
**सायं प्रातः स कर्माग्नि-कार्यं भिक्षां चरन्गुरुम । भजन्भक्त्याऽस्वपन्नह्नि याचितां गुरवेऽर्पयन् ।।६१।।**
**तद्दत्तभुग्लब्धविद्यः स्नायाद्दत्वा वरं व्रती । अनाश्रमी न तिष्ठेत भवेत्स प्रत्यवाय्यतः ।।६२।।**

सिद्ध उवाच। 'सर्वे शिष्या भविष्यामः इति मत्वा अत्र यान्ति अतः रह स्थेयं' इति मत्वा सद्गुरुः छात्रान् अब्रवीत्।५९। संस्कारैः द्विजत्वं लब्ध्वा ब्रह्मचारी कृती सूत्र+मेखला+अजिन+दण्ड+धृक् द्वादश+अब्दं त्रयीम् पठन्।६०। तत्+दत्त+भुक् लब्ध+विद्या व्रती वरं दत्वा स्नायात्। अनाश्रमी न तिष्ठेत। सः प्रत्यवायी भवेत्।६१। सः सायं प्रातः कर्म, अग्नि+कार्यं, भिक्षां चरन् गुरुं भक्त्या भजन्, अह्नि अस्वपन्, याचितां (भिक्षां) गुरवे अर्पयन्।६२।

केवळ आपल्या भजनानेच शिष्याचा उद्धार करण्याचे सामर्थ्य असूनही परंपरेचे रक्षण करण्यासाठी तसेच शिष्यांची परीक्षा पाहण्यासाठी भगवंत गुप्त झाले हे स्पष्ट करण्याच्या हेतूने सिद्धमुनी उत्तर देतात. 'सगळे - अधिकारी आणि अनधिकारीही, 'आपणही शिष्य होऊं' या अशा विचाराने आपल्याकडे येतील तरी एकांतवास स्वीकारावा' असा विचार करून सद्गुरू शिष्यांना म्हणाले.५९.

**ब्रह्मचर्याश्रम -** कर्मकांडांत पुढे सांगण्यांत येणाऱ्या कर्मांनी द्विजत्व प्राप्त करून यज्ञोपवीत (जानवे), मेखला (कडदोरा), कृष्णाजिन आणि दंड धारण करणाऱ्या कुशल ब्रह्मचाऱ्याने बारा वर्षे ऋक्, यजु आणि साम या वेदत्रयीचे पठण करावे. त्रयी या स्त्रीलिंगी शब्दाचा अमरकोशांत (१:६:३) हाच अर्थ दिला आहे.६०. अशा रीतीने सद्गुरूंच्याकडून विद्या संपादन केल्यावर त्यांना गुरुदक्षिणा देऊन समावर्तन करावे. आश्रमाविरहित राहू नये; कारण त्याने प्रत्यवाय दोष लागतो.६१. त्याने सकाळ-संध्याकाळ संध्यावंदनादि नित्यकर्मे, अग्निसाठी समिधा आणणे इत्यादि कर्मे तसेच भिक्षा यांचे आचरण करावे, दिवसां झोपू नये आणि आणलेली भिक्षा गुरूंना अर्पण करावी.६२.

**स्नातकस्तूद्वहेद् भार्यां गृह्यं परिचरेद् गृही । पोष्यभृद्यज्ञकृद्वेद-शास्त्रधर्मपरो भवेत् ।।६३।।**
**पुत्रार्पितश्रीर्भार्यायुगग्राम्यविषयो वने । यतात्माऽकृष्टपच्याशी यावच्छुद्ध्यन्तरं वसेत् ।।६४।।**
**स्वारोपिताग्निः स वान-प्रस्थो भार्याज्ञयाऽममः । प्रव्रजेद्यतिधर्मज्ञो विरक्तस्तु कुतोऽपि हि ।।६५।।**

स्नातकः तु भार्यां उद्वहेत्। गृही गृह्यं परिचरेत्। पोष्य+भृत् यज्ञ+कृत् वेद+शास्त्र+धर्म+परः भवेत्।६३। पुत्रार्पित+श्रीः भार्या+युक् अग्राम्य+विषयः यतात्मा अकृष्ट+पच्य+आशी यावत् शुद्धि+अन्तरं वने वसेत्।६४। सः वानप्रस्थः स्व+आरोपित+अग्निः भार्या+आज्ञया अममः यति+धर्मज्ञः प्रव्रजेत्। विरक्तः तु कुतः अपि।६५।

**गृहस्थाश्रम -** विद्येत न्हालेला किंवा व्रताने शुद्ध झालेला किंवा दोन्ही तो स्नातक. सोडमुंज झाल्यावर भार्येचे पाणिग्रहण करावे. इथे 'तु' शब्दाने गृहस्थाश्रम ऐच्छिक असल्याचे सुचविलेले आहे. सामर्थ्य असेल तर नैष्ठिक ब्रह्मचर्य स्वीकारावे अशा अर्थाचे स्मृतिवचन आहे. गृहस्थाने आपल्या गृह्यसूत्रानुसार धर्माचरण करावे. यांत अग्निपरिचर्येचाही समावेश जाणावा. मुंडकोपनिषदांत (१:२:३) सांगितल्याप्रमाणे, अग्निहोत्र, दर्श, पौर्णिमास, आग्रयण, चातुर्मास, वैश्वदेव इत्यादि होम न करणाऱ्या किंवा विधीशिवाय होम करणाऱ्या आणि अतिथींचा सत्कार न करणाऱ्याचे सातही लोक नाश पावतात. याच अभिप्रायाने गृहस्थाने पोष्यांचे पोषण करावे आणि यज्ञांचे अनुष्ठान करावे असे म्हटले आहे. त्याने वेद आणि शास्त्रांत पुरस्कारलेल्या धर्माचे परिपालन करावे. कर्मकांडांत हा विषय अधिक स्पष्ट होणारच आहे.६३. **वानप्रस्थाश्रम -** गृहस्थाश्रमाचा समारोप करून सर्व संपत्ती पुत्राला देऊन, भार्येसह किंवा एकट्यानेच ग्राम्य विषयांचा त्याग करून, मनाचे नियमन करून, शेतीतून पिकवलेल्या धान्याशिवाय इतर आहार ग्रहण करून चित्तशुद्धी होईपर्यंत वनांत राहावे.६४. **संन्यासाश्रम -** (चित्तशुद्धीनंतर) त्या वानप्रस्थाने अग्नीचा समारोप करून भार्येच्या संमतीने निर्मम होऊन यतिधर्माचे ज्ञान करून घेऊन संन्यास ग्रहण करावा. यति म्हणजे इंद्रियांवर विजय मिळवलेला. हा क्रम वैराग्याच्या अभावी सांगितलेला आहे. वैराग्य उत्पन्न झाले तर ब्रह्मचर्याश्रमांतून किंवा गृहस्थाश्रमांतूनही संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. ज्या दिवशी विरक्ती उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास घ्यावा असे जाबालोपनिषदाचे (४) वचन आहे. हि शब्दाच्या योजनेतून आचार्यादिकांच्या उदाहरणावरून हे प्रसिद्धच असल्याचे सुचविले आहे.६५.

**त्रिकालस्नायी संन्यासी न्यस्तसूत्रशिखैषणः । जपभिक्षाटनध्यान-शौचार्चनरतो वशी ।।६६।।**
**स्त्रीकथालौल्ययानाहः-स्वापखट्वाऽस्पृगात्मदृक् । सद्वेणुमृद्दार्वलाबु-मयभाजनदण्डधृक् ।।६७।।**
**सकृदह्न्याप्तसद्भिक्षा-भुक्शान्तस्तत्त्वचिन्तकः । तीर्थान्यटन्नृते वर्षास्त्र्यहमेकस्थले वसन् ।।६८।।**
**स्थिरीकृतमनाः क्वापि ततस्तिष्ठन्सुखी भवेत् । अशक्तस्तु महाक्षेत्रे हरिं ध्यायन्वसेत्सदा ।।६९।।**

त्रिकालस्नायी संन्यासी। न्यस्त+सूत्र+शिखा+एषणः जप+भिक्षा+अटन+ध्यान+शौच+अर्चन+रतः वशी।६६। स्त्रीकथा+लौल्य+यान+अहः+स्वाप+खट्वा+अस्पृक् आत्म+दृक् सत्+वेणु+मृत्+दारु+अलाबु+मय+भाजन+दण्ड+धृक् ।६७। सकृत्+अह्नि+आप्त+सत्+भिक्षा+भुक् शान्तः तत्त्व+चिन्तकः वर्षाः ऋते तीर्थानि अटन् त्रि अहं एक+स्थले वसन्।६८। स्थिरी+कृत+मनाः ततः क्व अपि तिष्ठन् सुखी भवेत्। अशक्तः तु हरिं ध्यायन् सदा महाक्षेत्रे वसेत्।६९।

तीन वेळां स्नान करण्याचा नियम कुटीचक आणि बहूदक यांना लागू आहे. हंस संन्याशाने एकदांच स्नान करावे आणि परमहंसाला कांहीच नियम नाही (नारदपरिव्राजक उ. ४:२३). संन्यासाचे दोन प्रकार - पहिला विद्वत्संन्यास आणि दुसरा विविदिषासंन्यास. जानवे, शेंडी आणि तीन एषणांचा त्याग केल्याने होणाऱ्या विविदिषा संन्यासाने कृतकृत्यता प्राप्त होते. म्हणून त्याचे धर्म पुढे सांगितले आहेत. जितेंद्रिय होऊन प्रणवाचा जप, भिक्षा, संचार, ध्यान, शौच आणि देवपूजा ह्या कर्मात त्याने निमग्न राहावे.६६. स्त्रियांच्या गोष्टी, इंद्रियांचे लाड, वाहन, दिवसा झोप आणि खाट (पलंग) यांना स्पर्शही करू नये. आत्म्याच्या चिंतनात राहावे. चांगल्या वेळूचा, मातीचा, लांकडाचा किंवा भोपळ्याचा कमंडलु तसेच दंड धारण करावा.६७. दिवासांतून एकच वेळ मागून आणलेली शुद्ध भिक्षा ग्रहण करावी. माधुकरी, तात्कालिक, किंवा अयाचित यांसारखी भिक्षा चांगली समजावी. पावसाळ्याचे दिवस सोडून (चातुर्मास, आषाढ शुद्ध पौर्णिमा ते भाद्रपद शुद्ध पौर्णिमा हे दोन महिने संन्याशांचा चातुर्मास असतो.) सतत तीर्थयात्रा करावी. एका गांवी तीन दिवसांपेक्षां अधिक राहू नये.६८. मन स्थिर झाल्यावर - निर्बीजसमाधीची प्राप्ती झल्यानंतर मग कुठेही राहून सुखी व्हावे. **सुखी** म्हणजे बुद्धिग्राह्य अतींद्रिय स्वात्मसौख्यांत रमून राहावे. अशक्ताने मात्र सतत ईश्वराचे ध्यान करीत काशी आदींसारख्या महाक्षेत्रांत राहावे.६९.

**तस्मात्कृध्वं स्वाश्रमार्हं कृत्यं पातोऽन्यथा भवेत् । इत्युक्त्वान्यान्प्रेरयित्वा गृहेभ्योऽजोऽब्रवीद्यतीन् ।।७०।।**
**काशी प्रयागो गया च श्रीरङ्गः पुरुषोत्तमः । श्रीशैलो नैमिषारण्यं कुरुक्षेत्रं बदर्यपि ।।७१।।**
**गोकर्णः शङ्खकर्णश्च काञ्च्ययोध्या च गोकुलम् । मथुरा द्वार्वती मायावंतिका करवीरपूः ।।७२।।**
**गन्धर्वपूर्हरिहर-क्षेत्रं सद्देवकन्यका । गुहाश्रमः सेतुबन्ध इत्यादिक्षेत्रविस्तरः।।७३।।**

तस्मात् स्व+आश्रम+अर्हं कृत्यं कृध्वम्। अन्यथा पातः भवेत्। इति उक्त्वा अन्यान् गृहेभ्यो प्रेरयित्वा अजः यतीन् अब्रवीत्।७०। काशी, प्रयागः, गया च श्रीरङ्गः, पुरुषोत्तमः, श्रीशैलः, नैमिषारण्यं, कुरुक्षेत्रं, बदरि अपि;।७१। गोकर्णः, शङ्खकर्णः, काञ्ची, अयोध्या, च गोकुलम्, मथुरा, द्वार्वती, माया, अवंतिका, करवीरपूः,।७२। गन्धर्वपूः, हरिहर+क्षेत्रं, सत्+देवकन्यका, गुहाश्रमः, सेतुबन्धः इत्यादि क्षेत्रविस्तरः।७३।

हे सर्व आपापल्या आश्रमाला योग्य असे कर्म तुम्ही सर्वांनी करावे. अन्यथा प्रत्यवायाचा दोष लागून अधःपात होतो, असे जन्मादिविकारातीत श्रीगुरूंनी सर्वांना सांगून आपापल्या घरी त्यांना पाठविले. याला प्रमाण म्हणून मनुस्मृतीचा पुढील श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी दिला आहे. *'अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसज्जञ्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति*।।११:४४।।' (विहित कर्माचा त्याग करून विषयांच्या आसक्तीने निंद्य कर्म आचरणारा पुरुष पतन पावतो.) इतर सर्व आश्रमांतील पतितांना प्रायश्चित्ताने शुद्धी होऊ शकते. संन्यासाश्रमांतून पतन पावलेल्याला मात्र प्रयत्नाने कदाचित् आमुष्मिकी (परलोकांत) शुद्धी असली तरीही इहलोकांत प्रायश्चित्ताचे विधान कुठेही शास्त्रांत सांपडत नाही. तो देहाने आमरण अशुद्धच राहतो. शास्त्र आणि रूढी या दोन्ही पक्षी तो बहिष्कृतच ठरतो (ब्रह्मसूत्र ३:४:४३). त्याचप्रमाणे नैष्ठिक ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेल्यालाही प्रायश्चित्त नाही (अत्रिस्मृति ८:१६). त्यालाही कदाचित् आमुष्मिकी शुद्धी असेलही; पण शास्त्रदृष्ट्या भ्रष्ट झाल्याने व त्यासाठी दैहिक प्रायश्चित्ताचे विधान नसल्यामुळे तो पतितच राहतो (ब्रह्मसूत्र ३:४:४१). खालच्या आश्रमांतून वरच्या आश्रमांत चढतां येते;

**गङ्गासरस्वत्यर्कोत्था विपाट्पौष्णी मरुद्वृधा । वितस्तासिक्न्यनेकास्या चन्द्रभागा पयस्विनी ।।७४।।**
**शरावती मधुमती रेवा गोदाऽमरोद्भवा । सरयू कौशिकी पूर्णा भीमा कृष्णा मलापहा ।।७५।।**
**कावेरी प्रवरा तुङ्गा क्षिप्रा तापी च वेदिका । चर्मण्वती गण्डकीति पूर्वा नद्यो नदा अपि ।।७६।।**
**तत्संगमा अप्यघघ्नास्तीर्थान्यन्यान्यनेकशः । तीर्थानि गुरुसंचाराच्छश्वद्द्वादशसिन्धुषु ।।७७।।**

गङ्गा, सरस्वती, अर्क+उत्था, विपाट्, पौष्णी, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी, अनेकास्या, चन्द्रभागा, पयस्विनी।७४। शरावती, मधुमती, रेवा, गोदा, अमर+उद्भवा, सरयू, कौशिकी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलापहा।७५। कावेरी प्रवरा, तुङ्गभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इतिपूर्वा नद्यः, नदा अपि।७६। तत् संगमा अपि अघघ्नाः अन्यानि अनेकशः तीर्थानि। गुरु+संचारात् द्वादश सिन्धुषु,।७७।

पण वरच्या आश्रमांतून खालच्या आश्रमांत उतरतां येत नाही. निम्न आश्रमांत अवरोहण करण्याला आसक्तीच कारण आहे. ही आसक्तीच मिथ्या ज्ञानांतून उद्भवलेली असल्याने निषिद्ध आहे (ब्रह्मसूत्र ३:४:४०). नंतर ते आपल्या संन्यासी शिष्यांना तीर्थांचे परिभ्रमण करायला सांगतात.७०.

**तीर्थयात्रा -** काशी, प्रयाग, गया, श्रीरंगपट्टण, पुरुषोत्तम, श्रीशैल्य, नैमिषारण्य, कुरुक्षेत्र, बदरिनाथ, गोकर्ण, शंखकर्ण, कांची, अयोध्या, गोकुळ, मथुरा, द्वारका, हरिद्वार, उज्जैन, कोल्हापूर, गाणगापूर, हरिहर, कन्याकुमारी, कार्तिकस्वामी, रामेश्वर आणि इत्यादि शब्दांतून प्रभास, सिद्धपूर आदि क्षेत्रांचा निर्देश समजावा.७१-७३. गंगा, सरस्वती, यमुना, व्यास (बियास), रावी, मरुवर्मन, झेलम, चिनाब, सहस्रमुखी, चन्द्रभागा, पयस्विनी,७४. शरावती, मधुमती, गोदा, अमरजा, शरयू, कोसी, पूर्णा, भीमा, कृष्णा, मलप्रभा,७५. कावेरी, प्रवरा, तुंगभद्रा, क्षिप्रा, तापी, वेदिका, चर्मण्वती, गण्डकी इत्यादि नद्या आणि शोणभद्रादि नदसुद्धां (समुद्राला न मिळतां भूमीवरच संपणारे जलप्रवाह).७६. तसेच त्यांचे संगमही पापनाशक आहेत. पुष्कर, मानस, बिन्दु अशी इतर अनेक तीर्थे आहेत. गुरूच्या संचारानुसार तीर्थे बारा नद्यांत वास करतात. सिंहेला गुरू असतांना गोदावरी, कन्येला असतां कृष्णा, तुळेला असतां मलप्रभा, इत्यादि.७७.

**प्रचरन्ति सदा तास्तु स्वर्णदीस्नानपुण्यदाः । कृध्वं स्नानादि विधिवत्सर्वत्रात्र सरःस्वपि ।।७८।।**
**ग्रीष्मे रजस्वला नद्यो यद्दिनेऽम्बु नवं तदा । दशाहं नर्ते तीरस्थैः स्नानं मुख्यासु तु त्र्यहम् ।।७९।।**
**द्युरात्रमपि कूपादौ चरित्वैवं ततोऽखिलाः । श्रीशैलं बहुधान्येऽब्दे यात यास्याम्यहं ह्यपि ।।८०।।**

तीर्थानि प्रचरन्ति। तदा तु ताः स्वर्णदी+स्नान+पुण्यदाः। अत्र सर्वत्र सरःसु अपि विधिवत्, स्नानं कृध्वम्।७८। ग्रीष्मे यत् दिने अम्बु नवं तदा नद्यः रजस्वलाः। ऋते तीरस्थैः दशाहं, मुख्यासु त्र्यहं स्नानं न (कार्यम्)।७९। कूपादौ अपि द्युरात्रम्। एवं चरित्वा ततः अखिलाः बहुधान्ये अब्दे श्रीशैलं यात। हि अहं अपि यास्यामि।८०।

(**अर्कोत्था** = यमुना, **विपाट्**(श्) = बियास; **पौष्णी** (पुरुष्णी) = रावी; **मरुद्वृधा** = मरुवर्मन; **वितस्ता** = झेलम; **असिक्नी** = चिनाब; **कौशिकी** = कोसी)

त्या काळांत त्या नद्यांत स्नानाचे पुण्य गंगास्नानापेक्षांही अधिक आहे. ह्या सर्व तीर्थांत तसेच निरनिराळ्या सरोवरांतही सर्वांनी विधिपूर्वक स्नान, दान, श्राद्ध, ब्राह्मणभोजनादि कर्मे करावीत. महानदी आणि महाक्षेत्रांच्या ठिकाणी क्षौर करावे. सर्वत्र करण्याची आवश्यकता नाही.७८. आषाढ महिन्यांत जेव्हां नदीला नवीन पाणी येईल त्या वेळी त्या दहा दिवस रजःस्वला होतात. त्या काळांत तीरस्थांखेरीज इतरांनी दहा दिवस नदीवर स्नान करूं नये. महानदीसाठी हा काळ फक्त तीनच दिवसांचा आहे. कांही जणांच्या मते महानदींना रजस्वलत्व नाही.७९. आड, विहीर, तलाव इत्यादींनाही दोन दिवसांचे रजस्वलत्व पाळावे. अशी सर्व तीर्थयात्रा पूर्ण करून, 'बहुधान्य संवत्सराला सर्वांनी श्रीशैल्याला यावे. आपणही त्या वेळी तिथे येऊं' असे श्रीगुरूंनी सर्वांना सांगितले.८०. अशा रीतीने सर्व शिष्यवर्गांना तीर्थयात्रेला जाण्याची आज्ञा श्रीगुरूंनी केली आणि तेही त्यानुसार निघून गेले. मी मात्र श्रीगुरुचरणकमलांचा भ्रमर होऊन तिथेच राहिलो.८१.

**इत्युक्त्वा प्रेरयामास यात्राया अपि ते ययुः । तत्रैव सद्गुरुपद-पद्मालिरभवं त्वहम् ।।८१।।**
**(क्षेपकौ) यद्वर्जुनाभ्यां विद्योगौ प्राहैष प्राग्यथा तथा । गुह्यौ मे प्राह ते शिष्य विनीत कथयामि ते ।।८२।।**
**इत्युक्त्वा प्रणतायोचे सिद्धः शिष्याय सत्तमः । याभ्यां परं पुमान्याति स्वानन्दो वैष्णवं पदम् ।।८३।।**

**।। इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे तीर्थयात्रोद्देशो नाम नवमोऽध्यायः ।।९।।**

**सप्ताहपारायणे द्वितीयः । अन्ते रसज्ञा वशा..स्तोत्रम् पठनीयम् । अन्यदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

इति उक्त्वा यात्राया प्रेरयामास। ते अपि ययुः। अहं तु तत्र एव सद्गुरु+पद+पद्म+अलिः अभवम्।८१। यदु+अर्जुनाभ्यां गुह्यौ वित्+योगौ प्राक् यथा प्राह तथा एष मे प्राह। (हे) विनीत शिष्य ते कथयामि।८२। इति उक्त्वा सत्तमः सिद्धः प्रणताय शिष्याय (तौ योगौ) ऊचे याभ्यां पुमान् स्वानन्दो परं वैष्णवं पदं याति।८३।

(शेवटचे दोन श्लोक श्रीस्वामिमहाराजांनी क्षेपक म्हटलेले आहेत. त्याचे कारण असे दिसते की ह्यांचा विषय मूळ गुरुचरित्रांतला नाही. सिद्धमुनींनी नामधारकाला दिलेले हे आश्वासन आहे.) सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, 'ह्या दत्तप्रभूंनी यदु आणि कार्तवीर्यार्जुन यांना गूढ अशा ज्ञानमार्ग आणि योगमार्गांचा उपदेश पूर्वींच्या युगांत केला तसाच मलाही केला. हे शिष्योत्तमा, तूही नम्रतादि गुणांनी अधिकारी असल्याने ते मी तुला सांगत आहे'.८२. असे बोलून संतश्रेष्ठ सिद्धमुनींनी गीतेतील प्रतिपादनानुसार प्रणिपात, परिप्रश्न आणि सेवा यांचे अनुष्ठान करणाऱ्या शिष्याला - नामधारकाला, त्या दोन्ही योगांचे निरूपण केले, ज्यांयोगे पुरुष आनंदपूर्ण होऊन त्या परम वैष्णव पदाला पावतो.८३.

**तीर्थयात्रेचे महत्त्व -** *'उत्तमा सहजावस्था मध्यमा योगधारणा। अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाऽधमा।।'* अशी वर्गवारी शास्त्राने केलेली असली तरी महापाप्यांना मात्र प्रायश्चित्तादींच्या अनुष्ठानाने पापक्षय केल्याविना ज्ञान होऊ शकत नाही. 'आरशाचा पृष्ठभाग स्वच्छ केल्यावर त्यांत आपले प्रतिबिंब स्पष्ट दिसावे तसे पापकर्माच्या क्षयाने पुरुषाला

आत्मज्ञान होते; आपल्या चित्तांतच आत्म्याचे दर्शन होते.' (महाभारत, शांतिपर्व २०४:८) या स्मृतिवचनानुसार योग, याग इत्यादींचे अनुष्ठान करण्यास असमर्थ असणाऱ्या मुमुक्षूंना ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापाच्या क्षयासाठी, विवेकी लोकांसाठी कनिष्ठ गणल्या गेलेल्या तीर्थयात्रेचा उपदेश योग्यच आहे. पुरुषांसाठी विहित अशा संस्कारांनी संस्कृत झालेल्या शुद्धचित्तांतच आत्मज्ञान सहजच प्रकाशते. आत्मज्ञानाचा उदय झाल्यानंतर, त्या ब्रह्मानंदाचा रस लाभल्यावरच अभयावस्था लाभते (तैत्तिरीय उ. २:७). त्याला कुणाचीही भीती उरत नाही. पापपुण्य त्याला शिवू शकत नाहीत. अशी नैष्कर्म्यावस्था येते (तैत्तिरीय उ. २:९). त्यापूर्वी पूर्वसंचित पापकर्मांचा क्षय करून विद्येचा प्रादुर्भाव होण्यासाठीच कर्मांची आवश्यकता आहे. ही कर्मे बृहदारण्यकोपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे यज्ञ, दान, तप हीच होत. 'मग इथे तीर्थयात्रेचे निरूपण कसे केले?' अशा शंकेचे निराकरण स्वामिमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे. संसारसागरातून तारून नेणारी किंवा तरणोपाय असणारी ती तीर्थे अशा अर्थाने गंगादि ऋषिजुष्ट (ऋषींनी सेवन केलेल्या) जलांना तीर्थ असा शब्द रूढ झाला आहे. त्या जलांत स्नानादींनी कर्माच्या अनुष्ठानासारखाच पापक्षय होतो. यामुळेच ऋग्वेदांत (१:२३:२२-२३) तसेच तैत्तिरीय आरण्यकांत (१:१) जलदेवतांची प्रार्थना करणारे मंत्र आहेत. योगवासिष्ठांतही श्रीरामप्रभूंच्या तीर्थयात्रेचे वर्णन आलेले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा नववा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# दशमोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**शिष्यांस्तु तीर्थयात्रायै प्रेरयित्वा स्वयं कुह । उवास भगवान्ब्रूहि श्रोतुमिच्छामि सादरम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**संवत्सरं वैद्यनाथ-समीपमकरोद्विभुः । निवासमहमप्येतत्पादाब्जभ्रमरोऽभवम् ।।२।।**
**तत्रैत्यैको द्विजो मन्दो नमस्कृत्याब्रवीद्गुरुम् । प्रपद्ये भगवंस्त्वां मे मोक्षोपायमुपादिश ।।३।।**

नामधारक उवाच। शिष्यान् तार्थयात्रायै प्रेरयित्वा तु स्वयं भगवान् कुह उवास? (हे गुरो! मे) ब्रूहि। सादरं श्रोतुं इच्छामि।१। विभुः संवत्सरं वैद्यनाथसमीपं निवासं अकरोत्। अहं अपि तत्+पाद+अब्ज+भ्रमरः अभवम्।२। तत्र एकः मन्दः द्विजः गुरुं नमस्कृत्य अब्रवीत्। (भो) भगवन्! त्वां प्रपद्ये। मे मोक्ष+उपायं उपादिश।३।

श्रीगणेशाय नमः। **दहाव्यांत धौम्यगुरूंच्या शिष्यांची सांगुनी गोष्ट । पश्चात्तप्त द्विजाला करिती श्रीगुरु कृतार्थ ।।१।।** नामधारक विचारतो, सर्व शिष्यांना तीर्थयात्रेला पाठवून स्वतः भगवान कुठे बरे राहिले? मी आदरपूर्वक ऐकायला उत्सुक आहे; तरी आपण मला सांगा. या प्रश्नाच्या उत्तरांतून सिद्ध मुनी वेदांचे एक मर्म नामधारकाला सांगणार आहेत ते हे की गुरूंच्या मुखांतून श्रवण केलेली विद्याच उत्कृष्ट सिद्धीची प्राप्ती करून देते.१. 'प्रभूंनी परळी येथे वैद्यनाथांच्या निकट एक वर्ष वास्तव्य केले. मीसुद्धां त्यांच्या पदकमलांचा भ्रमर होऊन त्यांच्या सान्निध्याचा लाभ घेत होतो.२. तिथे असतांना एक मंदबुद्धी ब्राह्मण श्रीगुरूंना अभिवादन करून म्हणाला, 'हे प्रभो! मी आपल्याला शरण आलो आहे. तरी आपण मला मोक्षमार्गाचा उपदेश करावा.'३.

**मया तु सिद्धये कष्टं भूर्यकारि तथापि मे । नाप्ता सिद्धिर्नोपलब्धः सन्मार्गप्रापको गुरुः ।।४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कथं गुरुं विना वत्स सिद्धये केन योजितः । कस्याज्ञया कृतं कष्टमित्याकर्ण्य द्विजोऽब्रवीत् ।।५।।**

**सिद्ध्यै मया गुरुः कश्चिच्छ्रितश्चण्डः स तु प्रभो । सेवार्थी पीडयामास ततस्त्यक्तः स वै मया ।।६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**हन्तासाधु कृतं धिक्त्वां गच्छेतः सत्वरं यतः । गुरुद्रोह्यास्यावलोको न भद्राय कथंचन ।।७।।**

मया तु सिद्धये भूरि कष्टं अकारि। तथपि मे सिद्धिं न आप्ता। सन्+मार्ग+प्रापकः गुरुः न उपलब्धः।४। श्रीगुरुः उवाच। (हे) वत्स, गुरुं विना केन कथं सिद्धये योजितः? कस्य आज्ञया कष्टं कृतम्? इति आकर्ण्य द्विजः अब्रवीत्।५। मया सिद्ध्यै कश्चित् गुरुः श्रितः। (हे) प्रभो, स तु चण्डः, सेवार्थी, मां पीडयामास। ततः स मया त्यक्तः वै।६। हन्त! असाधु कृतम्। त्वां धिक्। इतः सत्वरं गच्छ, यतः गुरु+द्रोह्यस्य अवलोकः कथंचन भद्राय न।७।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, गुरूवीण कुणी, कशा प्रकारे मोक्षमार्गाला प्रवृत्त केले? आणि तू खूप कष्ट घेतले असे म्हणतोस ते कुणाच्या आज्ञेने? हे प्रश्न ऐकून तो ब्राह्मण सांगूं लागला.४. 'मी सिद्धीसाठी जपतपादि खूप कष्ट केले. तरीही मला ना सिद्धी मिळाली न परमार्थमार्गावर नेणारा गुरू मिळाला! मी मोक्षासाठी एका गुरूचा आश्रय केला होता. परंतु तो अति कोपिष्ट आणि केवळ सेवेची अपेक्षाच करणारा होता. त्याने माझा खूपच छळ केल्यामुळे मी त्याचा त्याग केला.'६. 'अरेरे! तू हे निंदनीय कृत्य केलेले आहेस. आपले दोन्ही कान ब्रह्माच्या यथार्थ निरूपणाने भरून टाकणारा गुरु आपल्या आईवडिलांसारखा असतो. त्याचा कधीही द्रोह करूं नये, असे मनूचे वचन आहे (मनुस्मृति २:१४४). तूं इथून ताबडतोब चालता हो! गुरुद्रोह्याचे तोंड पाहणाऱ्याचे कधीही भले होत नाही! मग त्याच्याशी संभाषणादि करणे तर दूरच.'७.

**प्रणिपातपरिप्रश्न-सेवाधर्मपराङ्मुखे । कुतो गुरुकृपालेशस्तद्वत्येव प्रसन्नता ।।८।।**

**।। द्विज उवाच ।।**

**कथं ज्ञेयः कथं सेव्यो गुरुस्तन्मे वदाखिलम् । अजानता गुरुद्रोहः कृतोऽतो मोद्धर प्रभो ।।९।।**

प्रणिपात+परिप्रश्न+सेवा+धर्म+पराङ्मुखे कुतो गुरुकृपालेशः? तद्वति एव प्रसन्नता।८। द्विज उवाच। गुरुः कथं ज्ञेयः, कथं सेव्यः तत् अखिलं मे वद। अजानता गुरुद्रोहः कृतः। अतो मां उद्धर।९।

**गुरूच्या त्यागाचा निषेध -** मनुस्मृतीत (५७:७) असेही सांगितले आहे की, कार्याकार्याचा विचार न करतां उन्मार्गगामी दोषलिप्त गुरूचाही त्याग करावा. मग छळवादी गुरूचा त्याग केल्याबद्दल त्या ब्राह्मणाला कां निघून जायला सांगितले? या शंकेचे निरसन करण्यासाठी पुढचा श्लोक सांगितला आहे. मनूच्या वचनांत गुरूचाही (*गुरोरपि*) असा शब्दप्रयोग आहे. त्याचा अर्थ असा होतो की दोषत्रयांनी लिप्त असा गुरूसुद्धां त्याज्य किंवा दंड्य आहे. मग इतरांची काय कथा? ह्याने इतरांच्या त्यागाला बळकटी दिलेली आहे. गुरूच्या त्यागाचे समर्थन केलेले नाही. 'प्रसंगी मातृगमन करावे पण गंगेच्या कांठी दान घेऊ नये; पुत्राचे मांस खाल्ले तरी चालेल पण राजाकडून दान घेऊं नये,' इत्यादि वचने मातृगमनाचे किवा पुत्रमांसभक्षणाचे समर्थन करणारी नाहीत तर गंगाप्रतिग्रहाचा आणि राजप्रतिग्रहाचा निषेध करणारी आहेत. अशा वचनांना चोदना मानल्या तर अनर्थ होईल आणि *'चोदनालक्षणो धर्मः'* (मीमांसादर्शन १:१:२) ह्या सूत्राचा विपर्यास होईल. दोषलिप्तही गुरूचा त्याग कधीही समर्थनीय ठरणार नाही; मग उपकारकर्त्या गुरूचा कसा ठरेल? शिवाय इथे तर त्या ब्राह्मणाने सेवेलाच पीडा मानून आळसापोटी गुरूला सोडून दिले आहे. 'शिष्याची योग्यता येण्यासाठी प्रणिपात, परिप्रश्न, सेवा ह्या धर्मांचे पालन करायला हवे. तो गुरू दोषत्रयलिप्त नसतांना त्याचा त्याग केला आहे. तेव्हां अशाचे तोंड पाहूं नये' हे श्रीगुरूंचे म्हणणे योग्यच आहे.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**गुरुर्निरुपमः साक्षाद् ब्रह्मविष्णुशिवात्मकः । सोऽज्ञेयस्त्वादृशैरन्धैस्तद्वत्सेवापि सद्गुरोः ।।१०।।**
**एतदर्थं पुरा वृत्तं शृणु धौम्याभिधो मुनिः । द्वापरेऽभूत् त्रयश्छात्रा आसन्तस्याङ्ग तत्पराः ।।११।।**

श्रीगुरुः उवाच। गुरुः निरुपमः। साक्षात् ब्रह्म+विष्णु+शिव+आत्मकः। सः त्वादृशैः अन्धैः अज्ञेयः। तद्वत् सद्गुरोः सेवा अपि (अज्ञेया)।१०। एतत् अर्थं पुरा वृत्तं शृणु। द्वापरे धौम्य+अभिधः मुनिः अभूत्। (हे) अङ्ग, तस्य त्रयः तत्पराः छात्राः आसन्।११।

वरील शिष्यधर्माचे पालन करणाऱ्यालाच गुरूची प्रसन्नता लाभते.८. श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्याचे मनन केल्यावर त्या ब्राह्मणाला स्वतःच्या अपराधाची जाणीव झाली. त्याचे परिमार्जन करण्यासाठी गुरूंना कसे ओळखावे आणि त्यांची सेवा कशा प्रकारे करावी ते तो श्रीगुरूंना विचारीत आहे. श्रीगुरूंविषयीच्या अज्ञानापोटी माझ्याकडून गुरुद्रोह झालेला आहे. तरी हे प्रभो, मला या पापांतून वर काढा.९. यावर श्रीगुरू म्हणाले, 'गुरूंना कशाचीही उपमा देतां येत नाही. ते साक्षात् ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांचे स्वरूप आहेत. तुझ्यासारख्या आंधळ्यांना सद्गुरूंचे किंवा त्यांच्या सेवेचे ज्ञान होऊं शकत नाही.' भ.पू.पा. श्रीशंकराचार्यांनी शतश्लोकींत (१) सद्गुरूंचे निरुपमत्व असे प्रतिपादले आहे. आत्मज्ञानाचे दान देणाऱ्या सद्गुरूंना त्रिभुवनांतही दृष्टांत सांपडत नाही. परीसाची उपमा द्यावी तो तो परीस लोखंडाचे सोने करतो, पण त्याला परीसत्व देत नाही. पण सद्गुरू मात्र आपल्या चरणांच्या आश्रयाला आलेल्या शिष्याला आपले साम्यच बहाल करतो. या कारणाने गुरू निरुपम आणि अलौकिक आहेत.' साहजिकच ते ब्रह्मा-विष्णू-शिवस्वरूप ठरतात.१०. याविषयींचा एक इतिहास ऐक. द्वापरयुगांत धौम्य नांवाचा एक मुनि होते. त्यांचे तीन शिष्य होते. ते सेवाधर्माचे ज्ञाते असल्याने गुरुसेवेला तत्पर होते.११.

**बैदारुणोपमन्य्वाख्याः सेवाधर्मसुशिक्षिताः । तेषां परीक्षितुं भावं गुरुः प्राह दयार्द्रधीः ।।१२।।**
**मच्छालेयेऽम्ब्वभावोऽस्ति जीवेत्सस्यमतः कुतः । गत्वा वः कोपि यत्नेन क्षेत्रमम्ब्वानयत्वरम् ।।१३।।**
**श्रुत्वैवमरुणोऽह्नाय गत्वा क्षेत्रसमीपतः । जलमानीय यत्नेन पल्वलात्क्षेत्रमुन्नतम् ।।१४।।**
**दृष्ट्वाऽकरोत्क्षेत्रतुल्यं वारिवारणमाशु तत् । जलप्रवाहः सहसा क्षेत्रादन्यत्र निर्ययौ ।।१५।।**
**न्यस्तोऽपि पाषाणचयः स्थातुं तत्र शशाक नो । मन्ये क्षेत्रे जलाभावाद् गुरुर्मां धिक्करिष्यति ।।१६।।**
**गुर्वर्थमत्र मर्तव्यमिति मत्वोभयत्र सः । स्वाङ्गं निधायोपरिष्टाज्जलैः क्षेत्रमपूरयत् ।।१७।।**

बैद+आरुणि+उपमन्यु+आख्याः सेवा+धर्म+सुशिक्षिताः। तेषां भावं परीक्षितुं दयार्द्रधीः गुरुः प्राह।१२। मत्+शालेये अम्बु+अभावः अस्ति। अतः सस्यः कुतः जीवेत्? वः कः अपि गत्वा यत्नेन क्षेत्रं अम्बु अरं आनयतु।१३। एवं श्रुत्वा अरुणः अह्नः क्षेत्रसमीपतः गत्वा पल्वलात् यत्नेन जलं आनीय, पल्वलात् क्षेत्रं उन्नतं दृष्ट्वा आशु क्षेत्रतुल्यं वारिवारणं अकरोत्। तत् जलप्रवाहः सहसा क्षेत्रात् अन्यत्र निर्ययौ।१५। तत्र न्यस्तः पाषाणचयः अपि स्थातुं न शशाक। (सः) मन्ये क्षेत्रे जल+अभावात् गुरुः मां धिक् करिष्यति।१६। अत्र गुरु+अर्थम् मर्तव्यं इति मत्वा सः उभयतः स्वांगं निधाय उपरिष्टात् जलैः क्षेत्रं अपूरयत्।१७।

त्यांची नांवे बैद, आरुणी आणि उपमन्यु अशी होती. त्यांच्या गुरुभक्तीची परीक्षा करण्यासाठी ते दयाळु गुरू त्यांना म्हणाले.१३. 'माझ्या भातशेतीला पाण्याचा तुटवडा आहे; ते पीक कसे तग धरील? तुम्ही कुणी तरी जाऊन प्रयत्नपूर्वक शेतीला लवकर पाणी पुरवा.'१४. धौम्यमुनींची ही आज्ञा ऐकून आरुणी लगेच शेतीकडे गेला. त्याने तलावांतील पाणी कालवा काढून प्रयत्नपूर्वक शेतीजवळ आणले. पण तळ्यापेक्षा शेती उंच असल्याने पाणी अडवून शेतीच्या वर चढविले. तरीही शेतीतून ते पाणी खाली वाहून गेले.१५. आरुणीने तिथे रचलेले दगडही वाहून गेले. त्याला असे वाटले की शेतीमध्ये पाणी आणले नाही तर गुरू माझा धिक्कार करतील.१६. इथे गुरूंच्या कार्यासाठी मरण आले तरी बेहत्तर असा विचार करून त्याने शेतीच्या बाहेर जाणारा पाण्याचा मार्ग आपल्या शरीरानेच अडविला आणि अशा रीतीने शेत पाण्याने भरून टाकले.१७.

**धौम्योऽपि क्षेत्रमेत्याम्बु-पूर्णं शालेयमीक्ष्य सः । खिन्नः शिष्यमदृष्ट्वैहि वत्सेत्यावाहयन्मुदा ।।१८।।**
**प्रत्युत्तरं जलाक्तान्त-रङ्गो दातुं स न क्षमः । किञ्चिद्ध्वनिं चकारासौ तच्छ्रुत्वैत्य ददर्श तम् ।।१९।।**
**कृपया परयोत्थाप्य भक्तिं ज्ञात्वा स तत्क्षणम । तस्मिन्प्रसन्नः सम्भूय स्वीयं साम्यं व्यधान्मुनिः ।।२०।।**
**विद्याविनयसंपन्नो भूत्वा संतोष्य सद्गुरुम् । तदाज्ञया ययौ धाम स्वमर्च्योऽभवदत्र सः ।।२१।।**
**ततो बैदं गुरुः प्राह सस्यं मे शिष्य सर्वतः । रक्षयित्वानु धान्यं तद्यत्नात्सर्वं समानय ।।२२।।**

धौम्यः अपि क्षेत्रं एत्य शालेयं अम्बु+पूर्णं ईक्ष्य सः शिष्यं अदृष्ट्वा खिन्नः वत्स, एहि, इति मुदा आह्वयत्।१८। परया कृपया (तं) उत्थाप्य (तस्य) भक्तिं ज्ञात्वा सः (गुरुः) मुनिः तस्मिन् प्रसन्नः सम्भूय तत् क्षणं स्वीयं साम्यं व्यधात्।१९। सः (शिष्यः) जलाक्त+अंतरंगः प्रत्युत्तरं दातुं न क्षमः। असौ किञ्चित् ध्वनिं चकार। तत् श्रुत्वा एत्य तं ददर्श।२०। (सः) विद्याविनयसंपन्नो भूत्वा सद्गुरुं संतोष्य तत्+आज्ञया स्वं धाम ययौ। अत्र सः अर्च्यः अभवत्।२१। ततः गुरुः बैदं प्राह, (हे) शिष्य, मे सस्यं सर्वतः रक्षयित्वा अनु तत् सर्वं धान्यं यत्नात् समानय।२२।

इतक्यांत धौम्यमुनीही शेतावर आले आणि रानांत पाणी भरलेले पाहून आनंदित झाले. पण शिष्य कुठे दिसत नाही असे पाहून खिन्नही झाले आणि बाळा, इकडे ये, अशा हांका मारूं लागले.१८. पाण्यांत बुडलेला असल्याने शिष्य त्यांच्या हांकेला प्रतिसाद देऊं शकला नाही. त्याने थोडासा आवाज केला. तो ऐकून गुरू तिथे आले आणि त्यांनी आपल्या शिष्याची अवस्था पाहिली.१९. त्याला तसे पाहून धौम्यमुनींच्या मनांत अत्यंत करुणा उपजली आणि आरुणीची भक्ती त्यांनी जाणली. ते त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला तात्काळ आपल्यासारखे केले.२०. अशा रीतीने विद्या आणि विनय यांनी संपन्न होऊन तसेच त्यांना दक्षिणादानाने संतुष्ट करून, सोडमुंज करून आपल्या घरी गेला. सद्गुरूंच्या प्रसादाने विद्वत्ता प्राप्त करून या लोकांत तो पूज्य झाला.२१. नंतर धौम्यगुरूंनी बैद नांवाच्या दुसऱ्या शिष्याला बोलावून सांगितले, ‘बा शिष्या, माझ्या शेतांतील पिकाची चांगली राखण करून मग खळे करून वेगळे केलेले सर्व धान्य प्रयत्नपूर्वक व्यवस्थित घेऊन ये.’ **सस्य** म्हणजे शेतांतील कणीस इत्यादि पीक; **धान्य** म्हणजे साळी इत्यादि कोंड्यासह असलेले; **तण्डुल** म्हणजे सडलेले तांदूळ; **अन्न** म्हणजे शिजवलेला भात.२२.

**आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा पशुपक्षिनिवारणैः । सस्यं ररक्ष पश्चात्तच्छित्वा धान्यं स निर्ममे ।।२३।।**
**शशंस गुरवे न्यस्तो धान्यराशिर्मया गुरो । क्षेत्रेऽत्रानेतुमेकं मे शकटं देहि सर्षभम् ।।२४।।**
**तच्छ्रुत्वा शकटं तस्मै स लुलायेन योजितम् । प्रददौ स तमादाय नीत्वा विन्यस्य चाखिलान् ।।२५।।**
**शालीनाहरदर्धाध्वं तत्र पङ्के सकासरः । संलग्नोऽभूत्स्वयं सोऽथ स्वकण्ठेऽयोजयद्युगम् ।।२६।।**
**सलुलायः स शिष्यस्तु तत्र भारातिरेकतः । पपात तत्र सहसा धौम्यः प्राप यदृच्छया ।।२७।।**

आज्ञा प्रमाणम् इति उक्त्वा सः पशु+पक्षि+निवारणैः सस्यं ररक्ष, पश्चात् तत् छित्त्वा धान्यं निर्ममे।२३। गुरवे शशंस, '(हे) गुरो, मया क्षेत्रे धान्य+राशिः न्यस्तः। अत्र आनेतुं मे एकं सः+ऋषभंर शकटं देहि।'२४। तत् श्रुत्वा सः तस्मै लुलायेन योजितं शकटं प्रददौ। स तं आदाय नीत्वा अखिलान् शालीन् विन्यस्य आहरत्।२५। तत्र अर्ध+अध्वं सकासरः (शकटः) पङ्के संलग्नः अभूत्। अथ सः स्वयं स्वकंठे युगं अयोजयत्।२६। सः शिष्यः तु तत्र भारातिरेकतः सलुलायः पपात। तत्र धौम्यः यदृच्छया सहसा प्राप।२७।

'आपली आज्ञा प्रमाण आहे,' असे म्हणून ती मस्तकी धारण करून, बैदाने पशू, पक्षी इत्यादिकांपासून त्या धान्याची राखण करून योग्य वेळी त्या पिकातील धान्य खळे करून धान्य बाजूला केले.२३. मग त्यांनी गुरूंना जाऊन सांगितले, 'गुरुमहाराज, मी शेतांत धान्याची रास लावली आहे. ते इथे घरी आणायला मला मला एक बैल जोडलेली गाडी पाहिजे.'२४. ते ऐकून गुरूंनी त्याला एक रेडा जोडलेला गाडा दिला. बैद तो गाडा घेऊन शेताला आला आणि त्याने सगळ्या साळी त्याने त्यांत भरल्या.२५. तो गाडा घेऊन येतांना अर्ध्या वाटेत तो रेड्यासकट चिखलांत रुतला. तेव्हां शिष्याने स्वतःलाच त्या गाड्याच्या जुवाला जुपून घेतले.२६. रेड्यासह स्वतः गाडा ओढत असतां तो शिष्य ओझे फार झाल्याने पडला. एवढ्यांत धौम्य ऋषि फिरत फिरत तिथे आले.२७.

**तत्कर्म प्रेक्ष्य घोरं तं मोचयित्वा प्रसन्नधीः । वरं तस्मै ददौ येन स परत्रात्र चोत्तमः ।।२८।।**
**अथोपमन्युमाहैष गाश्चारय सदेत्यथ । कतिकालं तदा चक्रे स्वल्पभुक्क्षुधितोऽभवत् ।।२९।।**
**वने विप्रालयान्प्रेक्ष्य स्वं पुपोषान्नयाच्ञया । पुष्टोऽसि कथमित्युक्तो गुरुणा तन्न्यवेदयत् ।।३०।।**
**तन्मे देहीति गुरुणा भाषितः स तथाकरोत् । स पश्चाद्याच्ञयारक्षत्स्वं तद्वेदापि वै मुनिः ।।३१।।**
**द्विवारमर्पयेत्यूचे सच्छिष्योऽपि तथाकरोत् । पीत्वा ररक्ष गा दुग्धं वत्सपीतावशेषकम् ।।३२।।**

तत् घोरं कर्म प्रेक्ष्य, तं मोचयित्वा प्रसन्न+धीः तस्मै वरं ददौ, येन सः परत्र अत्र च उत्तमः (बभूव)।२८। अथ एष उपमन्युं आह, 'सदा गाः चारय', इति। अथ कतिकालं स्वल्प+भुक् तथा चक्रे। क्षुधितो अभवत्।२९। वने विप्र+आलयान् प्रेक्ष्य स्वं अन्न+याच्ञया पुपोष। गुरुणा कथं पुष्टः असि? इति उक्त्वा तत् न्यवेदयत्।३०। गुरुणा तत् मे देही इति भाषितः सः तथा अकरोत्। स पश्चात् याच्ञया स्वं अरक्षत्। मुनिः तत् अपि वै वेद।३१। 'द्विवारं अर्पय', इति ऊचे। सत्+शिष्यः अपि तथा अकरोत। वत्स+पीत+अवशेषकं दुग्धं पीत्वा गाः ररक्ष।३२।

आपल्या शिष्याने जिवावर उदार होऊन केलेले ते गाडा ओढण्याचे भयंकर कर्म पाहून गुरूंनी त्याला जुवांपासून मोकळे केले. त्याच्या ह्या सेवाभावाने प्रसन्न झालेल्या धौम्य मुनींनी त्याला असा वर दिला जेणेकरून तो इहलोकांत विद्यादींच्या प्राप्तीने आणि परलोकांत दिव्य भोगांनी श्रेष्ठ गती पावला.२८. मग ह्या गुरूंनी उपमन्यूला, 'तूं गाई चारत जा', असे सांगितले. सकाळी लवकरच अल्पच आहार घेऊन तो गाई चारायला जाऊं लागला. पण त्याला भुकेने व्याकुळ केले.२९. रानांत ब्राह्मणाची घरे पाहून त्यांच्याकडे माधुकरी मागून तो आपले पोट भरू लागला. गुरूंनी त्याला विचारले, '(घरी अन्न पुरेसे मिळत नसतांही) तूं कसा धष्टपुष्ट दिसतोस?' तेव्हां त्याने त्यांना सर्व सांगितले.३०. गुरूंनी, 'ते माधुकरीचे अन्नही घरी आणून देत जा', असे सांगितल्यावरून तो तसे करूं लागला. मग तो पुन्हां एकदां माधुकरी मागून आपली भूक भागवूं लागला. तेसुद्धा गुरूंना कळलेच!३१. त्यांनी दुसरी भिक्षाही घरीच द्यायला सांगितली. त्या आज्ञाधारक शिष्याने बिनतक्रार तसेच केले. मग तो वासरांनी पिऊन सांडलेले गाईंचे दूध ओंजळीत घेऊन पिऊन गाई राखूं लागला.३२.

**तज्ज्ञात्वा धीभ्रंशभिया वारितो गुरुणा वने । अर्कक्षीरं दधौ पातुं तत्तस्याक्ष्णोः पपात ह ।।३३।।**
**स पपातान्धवद् गावो ययुर्गेहं गुरुस्तदा । अन्वेष्य तं तथा दृष्ट्वा तं प्राह स्तुहि रेऽश्विनौ ।।३४।।**
**सोऽश्विस्तवाद्दृष्टिमाप गुरुणा तदुपर्यपि । कृपा कृता तेन सोऽपि कृतकृत्योऽभवद्द्रुतम् ।।३५।।**
**तच्छिष्या अपि तत्तुल्या बभूवुः शृणु सादरम् । उद्दालकोऽस्य शिष्यः सन्सत्रेऽहीनदहद्बहून् ।।३६।।**

तत् ज्ञात्वा गुरुणा धी+भ्रंश+भिया वारितः। वने अर्कक्षीरं पातुं दधौ। तत् तस्य अक्ष्णोः पपात ह।३३। सः अन्धवत् पपात। गावः गेहं ययुः। तदा गुरुः तं अन्वेक्ष्य तथा दृष्ट्वा प्राह, 'रे, अश्विनौ स्तुहि।'३४। सः अश्वि+स्तवात् दृष्टिं आप। तत् उपरि अपि गुरुणा कृपा कृता। तेन सः अपि द्रुतं कृतकृत्यः अभवत्।३५। तत्+शिष्याः अपि तत्+तुल्या बभूव। सादरं शृणु। उद्दालकः अस्य शिष्यः सन्। सत्रे बहून् अहीन् अदहत्।३६।

ते गुरूंना समजल्यावर त्यांनी उष्टे दूध प्याल्याने बुद्धीवर दुष्परिणाम होईल म्हणून त्याला मनाई केली. तेव्हां तो एकदां वनांत गाई चारायला जात असतां एका तुटलेल्या रुईच्या झाडांतून गळणारा चीक त्याने पाहिला. तेव्हां 'हे कांही उष्टे नाही' असा विचार करून पिण्यासाठी ओंजळीत घेतले. पण ते पीत असतांना चुकून त्याच्या डोळ्यांत गेले.३३. त्यामुळे त्याची दृष्टी जाऊन तो आंधळ्यासारखा तिथे एका खड्ड्यात पडला. गाई घरी गेल्या. तेव्हां उपमन्यू कां आला नाही याचा शोध घेत, त्याच्या कण्हण्याच्या आवाजाच्या अनुरोधाने गुरू तिथे आले. त्यांनी त्याची ती अवस्था पाहून त्याला अश्विनीकुमारांची स्तुती त्यांच्या मंत्राद्वारा करायला सांगितली.३४. त्याप्रमाणे उपमन्यूने अश्विनीकुमारांचे स्तवन केले आणि त्याची दृष्टी परत आली. पूर्वीच्या दोन शिष्यांप्रमाणे त्याच्यावरही गुरूंनी कृपा केली आणि तोसुद्धां कृतकृत्य झाला.३५. त्याचे - उपमन्यूचे शिष्यही त्याच्यासारखेच श्रेष्ठ झाले. उद्दालक नांवाच्या त्याच्या शिष्याने जनमेजयाने केलेल्या सर्पसत्रांत असंख्य सर्पांची आहुती दिली.३६.

**जनमेजयतोषार्थं स्वर्गाच्छक्रं समानयत् । अयं गुरुप्रसादस्तत्-तोषात्प्राप्यो न चान्यथा ।।३७।।**
**अतस्तमेव शरणं सर्वभावेन गच्छ भोः । तत्प्रसादात्परां शान्तिं मोक्षं प्राप्स्यसि दुर्लभम् ।।३८।।**

**।। विप्र उवाच ।।**

**युज्यते भिन्नधात्वैक्यं न मुक्तायास्तथा हृदः । तद्धृद्भिन्नं न यास्येऽतः प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ।।३९।।**
**इति तन्निश्चयं ज्ञात्वा के विन्यस्य करं गुरुः । तापदग्धाशुभस्यास्य प्राहाङ्ग स्वगुरुं स्मर ।।४०।।**

जनमेजय+तोषार्थं स्वर्गात् शक्रं समानयत्। अयं गुरु+प्रसादः तत्+तोषात् प्राप्यः। न च अन्यथा।३७। भोः, अतः तं एव सर्व+भावेन शरणं गच्छ। तत्+प्रसादात् परां शांतिं (तथा) दुर्लभं मोक्षं प्राप्स्यसि।३८। विप्र उवाच। भिन्न+धातु+ऐक्यं युज्यते, न मुक्तायाः। तथा हृदः। तत् हृत् (मया) भिन्नम्। अतः न यास्ये। ते अग्रतः प्राणान् त्यक्ष्यामि।३९। इति तत्+निश्चयं ज्ञात्वा ताप+दग्ध+अशुभस्य अस्य के करं विन्यस्य प्राह, अङ्ग, स्वगुरुं स्मर।४०।

जनमेजयाच्या आदेशाने त्याने तक्षकाला आश्रय दिलेल्या इंद्रालाही स्वर्गांतून खाली आणले. हा गुरूंचा कृपाप्रसाद केवळ त्यांना प्रसन्न करूनच प्राप्त होतो. त्याला दुसरा कांहीही उपाय नाही. गुरुकृपेविण आपल्या बुद्धीच्या बळावर ते ज्ञान मिळवतां येत नाही. ही मति तर्काने मिळवतां येत नाही असे कठोपनिषदाचे (१:२:९) प्रतिपादन आहे.३७. 'अरे ब्राह्मणा, याकरितां तूं सर्वभावे तुझ्या गुरूंनाच शरण जा. गीतेच्या वचनानुसार (४:३९) त्यांच्याच ज्ञानरूपी प्रसादाने तुला परम शांतीचा तसेच दुर्लभ अशा मोक्षाचाही लाभ होईल.'३८. तो ब्राह्मण म्हणाला, 'प्रभो, सोन्याचांदीसारख्या धातूचे पात्र, अलंकार इत्यादी भंग पावले तर ते वितळवून जोडतां येतात. मोती मात्र फुटले तर जोडतां येत नाही. मनाचेही तसेच आहे. मी माझ्या गुरूंचे मन मोडले आहे. तरी मी आतां त्यांच्याकडे कोणत्या तोंडाने जाऊं? त्यापेक्षां मी माझ्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून इथेच आपल्यासमोरच प्राणत्याग करतो.'३९. हा त्याचा निर्धार पाहून पश्चात्तापाने त्याची पापे नष्ट झाल्याचे जाणून श्रीगुरूंनी त्याच्या शिरावर हात ठेवला आणि म्हणाले, 'बा ब्राह्मणा, आपल्या गुरूंचे स्मरण कर.'४०.

**द्विजोऽपि स्वगुरुं स्मृत्वा तत्स्वरूपमिव प्रभुम् । ददर्श श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टाव स मुदश्रुयुक् ।।४१।।**
**तमाह प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुस्त्वं यथाक्रमम् । लघु निस्तीर्य कर्मौघं परां संसिद्धिमाप्स्यसि ।।४२।।**
**त्वया व्यालोकि रूपं मे यत्तद्भक्त्या स्मरन्क्रियाः । मदर्थ इत्सदासक्तः कुर्वन्सिद्धिमुपैष्यसि ।।४३।।**
**इति द्विजं तं निजरूपदर्शनात् सुदुर्लभस्वात्मसुखान्वितं प्रभुः ।**
**विधाय चैकं द्विजपुत्रमागतं समुद्दधारच्छितजिह्वमप्यरम् ।।४४।।**
**(क्षेपकः) ये केचन श्रीगुरुमीशबुद्ध्या सन्तापदग्धैनस आव्रजन्ति ।**
**प्रच्छिद्य ते मोहसमूहमाशु स्वानन्दसौख्यं द्विजवत्प्रयान्ति ।।१।।**

**।। इति श्रीगुरुचरिते गुरुभक्त्यनुशासनं नाम दशमोऽध्यायः ।।१०।।**

द्विजः अपि स्वगुरुं स्मृत्वा प्रभुं तत्+स्वरूपं इव ददर्श। सः प्रेम्णा मुत्+अश्रु+युक् श्रीगुरुं तुष्टाव।४१। तं प्राञ्जलिं विप्रं श्रीगुरुः प्राह। कर्म+ओघं यथा+क्रमं लघु निस्तीर्य परां संसिद्धिं आप्स्यसि।४२ यत् मे रूपं त्वया व्यालोकि तत् भक्त्या स्मरन् इत् सदा क्रियाः मत्+अर्थ असक्तः कुर्वन् सिद्धिं उप+एष्यसि।४३। इति प्रभुः तं द्विजं निज+रूप+दर्शनात् सु+दुः+लभ+स्व+आत्म+सुख+अन्वितं विधाय च एकं छित+जिह्वं द्विजपुत्रं आगतं अरं सं+उत्+दधार।४४। ये केचन सन्ताप+दग्ध+एनस श्रीगुरुं ईश+बुद्ध्या आव्रजन्ति, ते द्विजवत् मोह+समूहं आशु प्रच्छिद्य स्वानंद+सौख्यं प्रयान्ति।१।

त्या विप्राने आपल्या गुरूंचे स्मरण करतांच त्याला श्रीगुरू भगवानांच्या ठिकाणी त्यांचेच दर्शन झाले. त्याचा भक्तिभाव उचंबळून डोळे आनंदाश्रूंनी डबडबले आणि तो हात जोडून श्रीगुरूंचे स्तवन करूं लागला.४१.त्या विनम्र ब्राह्मणाला श्रीगुरू म्हणाले, ‘तुझ्या प्रारब्धानुसार एकामागून एक येणाऱ्या सुखदुःखांचे भोग सादर भोगून लवकरच संपवशील आणि अंती मोक्षरूपी परमसिद्धी पावशील.’ इथे प्रारब्धभोगांची अनिवार्यता आणि श्रीगुरु-ईशकृपेने त्यांचे सुसह्यत्व दाखविले आहे.४२. नारदपुराणांत (पूर्वार्ध ३१:६९-७०) म्हटले आहे की आपण केलेले शुभ तसेच अशुभ

कर्म भोगावेच लागते. न भोगतां कर्म अब्जावधी कल्पांतही घटणार नाही. मग अगणित जन्मातील संचित कर्म आणि सतत निर्माण होत असलेले क्रियमाण कर्म पाहतां हा कर्मांच्या ओघांतून लवकर कसे पार पडतां येईल? ह्या प्रश्नाचे उत्तर ह्या श्लोकांत दिले आहे. 'हे जे माझे स्वरूप तूं पाहिले आहेस त्याचे सतत भक्तिपूर्वक चिंतन करीत सर्व नित्य-नैमित्तिक कर्मे अनासक्त वृत्तीने माझ्या प्रीत्यर्थच करीत जा. जशी देवावर तशीच गुरूंवर भक्ती (श्वेताश्वतर उ. ६:२३) ठेव. अशा ह्या निष्काम कर्मयोगाच्या आचरणाने तुझे अंतःकरण शुद्ध होऊन त्यांत ज्ञानाचा प्रकाश पडेल आणि द्वैताचे स्फुरण मावळून तुला मुक्तीचा लाभ होईल.'४३. अशा प्रकारे त्या विप्राला आपल्या स्वरूपाच्या दर्शनाने अत्यंत दुर्लभ अशा प्रत्यगात्मा (स्व) आणि परमात्मा यांच्या अखंडैकरस सामरस्याने होणाऱ्या सुखाचा लाभ करून दिला आणि कृष्णातीरावर एका जीभ कापून आलेल्या ब्राह्मणपुत्राचा उद्धार केला.४४. (ह्या श्लोकांतील विषय मूळ गुरुचरित्रात असा आलेला नसल्याने त्याला क्षेपक म्हटले असावे.) जे कुणी पश्चात्तापाच्या आगीत आपली पापे जाळून श्रीगुरूंना परमेश्वरस्वरूप मानून शरण येतात ते सर्व मोहमायेचा तत्काळ भेद करून आत्मानंदाचे अधिकारी होतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा दहावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**क आगतश्छातजिह्वः कथं भगवतोद्धृतः । तत्कथामृतमास्वाद्य तृष्णा मेऽतीव वर्धते ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**करवीरे सुधीपुत्रो जातोऽज्ञस्तं जगुर्बुधाः । विपुच्छशृङ्गो गौस्त्वं गोभाग्यं नात्तं तृणं तु यत् ।।२।।**
**विद्यानिधिर्हर्त्रलभ्यः स शिष्यार्पित एधते । श्रेष्ठेष्वर्च्यं करोत्यूनं क्वाप्यस्वं च धनान्वितम् ।।३।।**

नामधारक उवाच। कः छात+जिह्वः आगतः? भगवता कथं उद्धृतः? तत् कथा+अमृतम् आस्वाद्य मे तृष्णा अतीव वर्धते।१। करवीरे सु+धी+पुत्रः अज्ञः जातः। तं बुधाः जगुः। त्वं वि+पुच्छ+शृंगः गौः। यत् तृणं न अत्तं तत् गो+भाग्यम्।२। विद्या हर्तृ+अलभ्यः निधिः। सः शिष्य+अर्पितः एधते। ऊनं श्रेष्ठेषु अर्च्यं करोति। क्व अपि च अस्वं धन+अन्वितं (करोति)।३।

**श्रीगणेशाय नमः।** *अकराव्यांत संत्रस्त ब्राह्मणाची। छिन्न जीभ सांधुनी साची। गंगानुजावर साउली कृपेची। करुनी पादुका स्थापिल्या।।१।।* सद्गुरूंचा आश्रय केल्यानेच अखंडतया एकरस होऊनच निर्गुण आत्मतत्त्वाची ओळख पटते हाच खरा सिद्धांत असला तरी मंदबुद्धी साधकांना सगुण परमात्म्याचीच उपासना इष्ट आहे. त्यासाठी भगवंताच्या गुणांचे वर्णन करावे. आत्मसाक्षात्कारानंतर स्त्री-पुत्रादि विषयांपासून मनाची सहजच उपरती होते. पण अनेक जन्मात केलेल्या विषयसेवनाने, त्या विषयांकडे असलेला ओढा सहसा कमी होत नाही. त्या विषयांची आसक्ती दूर करण्यासाठी ईश्वररूप अशा सद्गुरूंची सेवा केली पाहिजे हे मागच्या अध्यायांत सफल गुरुसेवेच्या उदाहरणाने स्पष्ट केले. त्याच्याच दृढीकरणासाठी आतां या अध्यायांत इतर देवतादिकांच्या उपासनेपेक्षा ईश्वराचेच सगुण रूप असलेल्या सद्गुरूंच्या उपासनेने ऐहिक आणि पारलौकिक लाभही अनायासेच होतात हे विशद करण्याला आरंभ करीत आहेत.

**सुखे स्त्रीवावनेऽम्बेव सखेव क्वापि तातवत् । हिते बोधे च गुरुवद्विद्या धिक्त्वामविद्य रे ।।४।।**

**इति निर्भर्त्सितस्त्रस्तो भिल्लवाटीं ययौ स तु । प्रायोपविष्टोऽनशन आनर्च भुवनेश्वरीम् ।।५।।**

सुखे स्त्री इव। अवने अम्बा इव। क्व अपि सखा इव। हिते तातवत्। बोधे च गुरुवत्। हे अविद्य त्वां धिक्।४। इति निर्भर्त्सितः त्रस्तः सः भिल्लवाटीं ययौ। प्रायोपविष्टः अनशनः भुवनेश्वरींआनर्च।५।

नामधारक प्रश्न करीत आहे. 'मागील अध्यायाच्या शेवटी आपण जीभ कापून घेतलेल्याही ब्राह्मणाचा उद्धार केला असे म्हटले. तो जीभ नसलेला कोण? भगवंतांनी त्याचा कसा उद्धार केला? त्या श्रीगुरूंचे कथामृत जितके प्राशन करावे तितकी त्याची गोडी वाढतच जाते. अशी ही अनुपम गुरुलीला मला कथन करावी.'१. सिद्ध मुनी सांगू लागले - श्रीक्षेत्र कोल्हापूर येथे एका ब्राह्मणाला दुर्दैवाने मंदबुद्धी मुलगा झाला. अभ्यासात त्याचे लक्षच लागत नसे. तेव्हां त्याचे शेजारचे व आप्त त्याला अभ्यासाकडे प्रवृत्त करण्यासाठी त्याला म्हणाले, केवळ आहार आणि विहारानेच तुष्ट रहाणारा असा तू केवळ शेपूट आणि शिंगे नसलेला पशूच आहेस. त्यांच्याप्रमाणे तूं गवत खात नाहीस हे त्यांचे सद्भाग्यच होय. (*'साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः। तृणं न खादन्नपि जीवमानः सद्भागधेयं परमं पशूनाम्।। नीतिशतकः १२'*)२. विद्या हा असा खजिना आहे जो चोराला गंवसत नाही; शिष्याला दिला तर कमी न होतां वाढतोच; अकिंचनालाही (ऊनं) श्रेष्ठांमध्ये पूज्य करतो; निर्धनालाही धनी बनवितो. (*'हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम्। कल्पान्तेष्वऽपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनं येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते।।'* नीतिशतकः १६)३. पत्नीप्रमाणे सुख देणारी, आईसारखी सांभाळणारी, देशाविदेशांत कुठेही मित्रासारखी, पित्याप्रमाणे हित करणारी आणि गुरूसारखी बोध देणारी विद्या तूं संपादली नाहीस. तुझा धिक्कार असो.४. अशा रीतीने त्यांच्या निंदेने आणि अपमानाने त्रासून तो भिलवडीला गेला. तिथे आमरण उपोषण करीत त्याने देवी भुवनेश्वरीची उपासना आरंभिली. ५.

**दत्वाऽलब्धप्रसादोऽस्यै जिह्वां छेत्तुं कमुद्यतः । स्वप्ने देव्याह तं दण्डी कृष्णातीरेऽस्ति तं भज ।।६।।**
**इति श्रुत्वा दुःखितोऽपि धृत्यागत्य स सद्गुरुम् । ननामाश्रूत्तगात्रस्तन्मूर्ध्न्यधाच्छ्रीगुरुः करम् ।।७।।**
**स्पर्शेऽयोऽपि यथा हेम हंसः काकोऽपि मानसे । यथा विद्वांस्तथाभूत्स सुजिह्वः स्पर्शनाद्विभोः ।।८।।**
**वज्राङ्कुशध्वजाब्जाङ्कं ध्यायन्त्यङ्घ्य्रब्जमस्य ये । अपैति तत्प्रसादाद्धी-जाड्याद्यं नात्र चित्रमित् ।।९।।**

जिह्वां छेत्तुं दत्वा अलब्धप्रसादः कं (छेत्तुं) उद्यतः। स्वप्ने तं देवी आह। कृष्णा+तीरे दण्डी अस्ति, तं भज।६। इति श्रुत्वा दुःखितः अपि धृत्या अश्रु+उत्त+गात्रः सः सद्गुरुं आगत्य ननाम। तत्+मूर्ध्नि श्रीगुरुः करं अधात्।७। यथा अयः अपि स्पर्शे हेमः, यथा काकः अपि मानसे हंसः तथा सः विभोः स्पर्शनात् सुजिह्वः विद्वान् अभूत्।८। ये अस्य वज्र+अंकुश+ध्वजा+अब्ज+अंकं अंघ्रि+अब्जं ध्यायन्ति तत्+प्रसादात् धी+जाड्यादि अपैति। न अत्र चित्रं इत्।९।

त्याने देवीला आपली जीभ कापून वाहिली तरी ती प्रसन्न झाली नाही. मग तो आपले डोकेच कापायला सिद्ध झाला. इतक्यांत त्याला दैवयोगाने झोप आली. स्वप्नांत त्याला देवीचे दर्शन झाले. ती त्याला म्हणाली, कृष्णेच्या पैलतीरावर एक संन्यासी आहेत. त्यांना तूं शरण जा म्हणजे तुझे काम होईल.६. हे ऐकून तो दुखाने व्याकुळ असूनही अश्रूंनी भिजलेल्या अंगाने धीर धरून सद्गुरूंकडे गेला आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. अशा त्या जीभतुटक्या ब्राह्मणाच्या मस्तकावर श्रीगुरूंनी आपला हात ठेवला.७. परीसाला लागतांच लोखंडाचेही जसे सोने व्हावे, मानस सरोवरांत कावळाही हंस व्हावा तसा भगवंतांच्या स्पर्शाबरोबर त्या ब्राह्मणाची जिह्वा चांगली झाली आणि तो विद्वानही झाला. जीभ चांगली झाली म्हणजे तुटलेली परत पुरती झाली एवढेच नव्हे तर ती उत्तम वक्तृत्वाने आणि सुमधुर आलापांनी संपन्न झाली. आत्मज्ञानाला योग्य अशा कार्यकारणांचा प्रादुर्भाव त्याच्यात झाला. तसेच त्याला व्यावहारिक आणि पारमार्थिक ज्ञानही प्राप्त झाले.८.

**गुर्वाज्ञया गृहं गत्वा सिद्धिं प्रापोभयीं द्विजः । भगवांस्तत उत्थाय दक्षिणाभिमुखो ययौ ॥१०॥**
**कृष्णावेणीपञ्चनदी-संगमं सुमनोहरम् । अष्टतीर्थान्वितं पुण्यं दृष्ट्वा तस्थौ परे तटे ॥११॥**
**सरस्वती शिवा भद्रा कुम्भी भोगवतीत्यमूः । कृष्णावेण्योः संगतास्तत्संगमस्तूत्तमोत्तमः ॥१२॥**

द्विजः गुरु+आज्ञया गृहं गत्वा उभयीं सिद्धिं प्राप। भगवान् ततः उत्थाय दक्षिण+अभिमुखः ययौ।१०। कृष्णा+वेणी+पंचनदी+संगमं अष्ट+तीर्थ+अन्वितं पुण्यं सुमनोहरं दृष्ट्वा परे तटे तस्थौ।११। सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती इति अमूः कृष्णावेण्योः संगताः। तत् संगमः तु उत्तम+उत्तमः।१२।

श्रीगुरूंच्या स्पर्शमात्राने त्या ब्राह्मणाची वाचा आणि बुद्धी प्रगल्भ झाल्याचे नवल करण्याचे कारण नाही. ज्या श्रीगुरूंच्या वज्र, अंकुश, पताका आणि कमळ या चिह्नांनी अंकित चरणांचे चिंतन करणाऱ्यांच्या प्रसादानेही बुद्धीचे मांद्य आदींचा निरास होतो, प्रत्यक्ष त्यांचीच कृपा झाल्यावर तो झाला तर आश्चर्य काय?९. तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने आपल्या घरी गेला. तिथे गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून अनासक्त वृत्तीने, ईश्वराच्या प्रीतीकरिता आणि लोकसंग्रहासाठी नित्यनैमित्तिक कर्मे आचरून स्त्री, पुत्र, गृह, धन इत्यादि इह लोकांत उपभोगण्याची (ऐहिक) आणि निरतिशय ब्रह्मानंदरूप आमुष्मिकी अशा दोन्ही प्रकारच्या सिद्धी पावला. भगवान् श्रीगुरूंनी तिथून निघून दक्षिण दिशेकडे प्रस्थान केले.१०. पद्मपुराणांत (उत्तरखंड १११:१३) कृष्णा साक्षात् विष्णूचे रूप आहे तर वेणी ही भगवान शंकरांचे. ह्या दोन नद्यांच्या भेदरहित हरिहरांचे स्वरूप असणाऱ्या कृष्णावेणीचा पंचनद्यांसह झालेला अत्यंत मनोहर, पुण्यप्रद आणि आठ तीर्थांनी युक्त असा संगम पाहून त्याच्या पश्चिम तीरावर औदुंबराच्या तळवटी श्रीगुरूंनी वास केला. ह्यावर श्रीस्वामिमहाराजांनी एक मार्मिक आणि हृद्य रूपक केले आहे. 'अष्टप्रकृतींच्या जुळणीने झालेल्या देहांत चिच्छक्ती आणि जीवशक्ती यांच्या संगमांत म्हणजेच अतीव चित्ताकर्षक आज्ञा चक्राच्या पल्याड ब्रह्मरंध्रांत श्रीगुरू स्थिरावले.

**स्थलं कुरुपुराख्यं तत्कुरुक्षेत्राधिपुण्यदम् । साक्षात्प्रयागोऽयमग्रे काश्याः श्रेष्ठं महास्थलम् ।।१३।।**
**तत्रोदुम्बरकल्पद्रुर्विश्वेट्तुल्योऽमरेश्वरः । योगिन्योऽपि चतुःषष्टिर्नरोऽप्यत्रामरो भवेत् ।।१४।।**
**स्वर्याति ना तपःस्नायी संगतेऽत्र सितासिते । तीर्थान्यवाक्प्रवाहेऽत्र महाघघ्नानि कोटिशः ।।१५।।**

तत् कुरुपुर+आख्यं स्थलं कुरुक्षेत्र+अधि+पुण्यदम्। अग्रे साक्षात् प्रयागः अयं काश्याः श्रेष्ठं महास्थलम्।१३। अत्र सित+असिते संगते तपः+स्नायी ना स्वः याति। अत्र अवाक् प्रवाहे महा+अघ+घ्नानि कोटिशः तीर्थानि।१४। तत्र उदुम्बर+कल्पद्रुः, विश्वेट्+तुल्यः अमरेश्वरः, योगिन्यः अपि (वसन्ति)। अत्र नरः अपि अमरः भवेत्।१५।

तट या शब्दांत जगताच्या उत्पत्ती-स्थिती-लयादि तटस्थलक्षणांचा संकेत आहे.' अथवा **पर** म्हणजे सर्वोत्कृष्ट आणि **अतटे** अर्थात् निस्सीम सच्चिदानंदस्वरूपांत विसांवले असाही अर्थ करतां येईल.११. सरस्वती, शिवा, भद्रा, कुम्भी, भोगवती ह्या पांच नद्या कृष्णा-वेणी यांना येऊन मिळतात तो संगम गङ्गा-यमुना इत्यादि उत्कृष्ट संगमांहूनही उत्तम आहे.१२. कुरुपुर नांवाचे हे क्षेत्र पद्मपुराणाने (स्वर्गखंड २७:९२) तिन्ही लोकांत विशेष मानले आहे. त्यानुसार कुरुक्षेत्राचे माहात्म्य भूलोकांतील सर्व तीर्थांच्या माहात्म्याइतकेच आहे. अशा कुरुक्षेत्राहून हा संगम अधिक पुण्यप्रद आहे. हा साक्षात् प्रयागच आहे. त्याच्यापुढे पूर्वेकडे युगालय (जुगुळ) हे काशीहून श्रेष्ठ महान क्षेत्र आहे.१३. ह्या धवल आणि कृष्ण प्रवाहांच्या संगमांत माघ महिन्यांत स्नान करणारे पुरुष (किंवा स्त्रिया) ऋग्वेदात (१०:७५:५) सांगितल्याप्रमाणे स्वर्गात जातात. दक्षिणाभिमुखी प्रवाहांत शुक्लतीर्थापासून संगमापर्यंत कोटिशः तीर्थे आहेत. छांदोग्य उपनिषदांत (५:१०:९) सांगितलेली सुवर्णचोरी, सुरापान, गुरुतल्प, ब्रह्महत्या आणि त्यांच्यांत सहभाग, ह्या पंचमहापापांचा नाश करणारी आहेत.१४. त्या श्रीगुरूंच्या निवासस्थानी असलेला औदुंबर हा कल्पवृक्षच आहे; पैलतीरावरचा अमरेश्वर हा विश्वेश्वरासमान आहे; तिथेच चौसष्ट योगिनींचाही वास आहे. अशा या पवित्र ठिकाणी राहणारे रागद्वेषादि असलेले मानवही शमदमादि दैवी संपदेने युक्त होतात.१५.

**मुमुक्ष्वाश्वासनं कामि-हितं सत्तमरञ्जनम् । दृष्ट्वाश्रमं मूर्तिमत्स्वं परात्मोदुम्बरे व्यधात् ।।१६।।**
**सद्विद्याढ्यामरपुरं प्राङ्निरीक्ष्यैत्य तत्र सः । स्वाचारं वैदिकं दीनं प्रभुर्भिक्षां स्म याचते ।।१७।।**
**भिक्षावृत्तेस्तदा साध्वी सात्त्विकस्य कुटुम्बिनी । अन्नाभावाद्ददौ शाकमातिथेयी तु भिक्षवे ।।१८।।**
**भक्त्यार्पितमपि प्राश्य शाकं संतृप्त ईश्वरः । तत्र शाकलतां दृष्ट्वा तामुत्पाट्याश्रमं ययौ ।।१९।।**
**तदा स्त्रीर्दुःखिता प्राह योगक्षेमकरी कुतः । उन्मूलिता लता नैव भिक्षाशाठ्यं मया कृतम् ।।२०।।**

मुमुक्षु+आश्वासनं, कामि+हितं, सत्+तम+रंजनं आश्रमं दृष्ट्वा परात्मा स्वं उदुम्बरे व्यधात्।१६। सत्+विद्या+आढ्य+अमरपुरं प्राक् निरीक्ष्य तत्र सः प्रभुः वैदिकं सु+आचारं दीनं भिक्षां याचते स्म।१७। तदा भिक्षा+वृत्तेः सात्त्विकस्य साध्वी कुटुम्बिनी भिक्षवे अन्न+अभावात् आतिथेयी शाकं ददौ।१८। भक्त्या अर्पितं शाकं अपि प्राश्य संतृप्तः ईश्वरः तत्र शाकलतां दृष्ट्वा तां उत्पाट्य आश्रमं ययौ।१९। तदा स्त्रीः दुःखिता प्राह, योग+क्षेम+करी लता कुतः उन्मूलिता? मया भिक्षा+शाठ्यं नैव कृतम्!२०।

मुमुक्षूंना आश्वासन देणारा, सकाम भक्तांचे इच्छापूर्तिरूप हित करणारा, संतसज्जनांना परमानंदाने रमविणारा तो आश्रम पाहून परमात्मरूप सद्गुरूंनी आपल्या स्वरूपाची तिथे विशेषत्वाने स्थापना केली.१६. सत् म्हणजे परा विद्या अभ्यासणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती असलेले अमरापूर पूर्वतीरावर पाहून तो मानवरूप भगवंत आचारसंपन्न, वैदिक आणि नम्र अशा एका ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागायला गेला.१७. तेव्हां यायावर वृत्तीने (भिक्षा मागूनच) निर्वाह करणाऱ्या त्या सात्त्विक ब्राह्मणाच्या साध्वी पत्नीने घरांत कांहीच अन्न नसल्याने त्या यतिवेषधारी श्रीगुरूंना (घेवड्याच्या शेंगांची) भाजी अतिथीला योग्य समजून वाढली.१८. भक्तीने अर्पण केलेली ती भाजी सेवन करूनच भगवंत तृप्त झाले. तिथून जातांना त्यांनी अंगणांत पसरलेला घेवड्याचा वेल उपटून टाकला आणि ते आपल्या आश्रमांत परतले.१९. तेव्हां ती ब्राह्मणी कळवळून आपल्या पतीला म्हणाली, 'अहो पहा तरी! त्या संन्याशाने आपला चरितार्थ चालविणारा घेवड्याचा वेल कसा उपटून टाकला! घरात खरेच कांही दुसरे नसल्याने मी त्यांना भाजी वाढली. त्यांना चाळविण्याचा माझा हेतू नव्हता.'२०.

**तां भर्तोचे मौनमेहि न कोऽपि सुखदुःखदः । लोकाः स्वकर्मसूत्रोता वृथाहङ्कारसंश्रिताः ।।२१।।**
**ईशाधीनं जगत्सर्वं येनाप्तव्यं तु यत्ततः । कोऽपि नेशोऽन्यथा कर्तुमायुश्चान्नं स यच्छति ।।२२।।**
**विश्वोद्भवलयत्राण-निदानस्यास्य चैकदृक । प्राज्ञेऽज्ञे राज्ञि रङ्केऽपि मा शुचस्तारकोऽस्त्ययम् ।।२३।।**

भर्ता तां ऊचे, मौनं एहि। न कः अपि सुख+दुःख+दः। लोकाः स्व+कर्म+सूत्र+उताः वृथा+अहंकार+संश्रिताः।२१। सर्वं जगत् ईशाधीनम्। येन यत् आप्तव्यं तत् अन्यथा कर्तुं तु कः अपि न ईशः। सः आयुः अन्नं च यच्छति।२२। विश्व+उद्भव+लय+त्राणस्य अस्य प्राज्ञे, अज्ञे, राज्ञि, रंके च अपि एक+दृक्। मा शुचः। अयम् तारकः अस्ति।२३।

पतीने तिला शांत राहायला सांगितले आणि म्हणाला, 'या जगांत कुणी कुणाला सुख वा दुःख देत नसते. आपल्या कर्माच्या धाग्यांत गुंतून सुख-दुःखांचा भोग घेणारे लोक कर्मपरतंत्र असूनही व्यर्थ मीपणा मिरवतात.' (*'सुखस्य दुःखस्य न कोपि दाता, परो ददातीति कुबुद्धिरेषा। अहं करोमीति वृथाभिमानः, स्वकर्मसूत्रे ग्रथितो हि लोकः।।' अध्यात्मरामायण* २:६:६) दुसऱ्याला बोल लावूं नये, त्यांचे दोष प्रकट करूं नयेत असा त्याचा अभिप्राय. 'वृद्ध मातापिता, साध्वी पत्नी, तान्हे मूल यांच्या पोषणासाठी शंभर दुष्कृत्येही करावी लागली तरी करावीत,' असे मनूचे (मनुस्मृति परिशिष्ट) सांगणे आहे. 'ते माझ्यासाठी असूनही मी दुःख करीत नाही. तूं तर पत्नी आहेस आणि तुझ्यावर कुणाच्याही पोषणाची जबाबदारी नाही. मग तूं का शोक करतेस?' पाप करणाऱ्याला जी गती तीच त्याचे पाप बोलून दाखविणाऱ्याची होते. यासाठी पत्नीला गप राहायला त्याने सांगितले.२१. 'हे सर्व जग ईश्वराधीन आहे. ज्याला जे कांही सुख वा दुःख मिळायचे असते तेच त्याला ब्रह्मसूत्रांच्या सिद्धांतानुसार परमात्माच (३:२:३८) देतो. त्यांत कुणीही बदल करूं शकत नाही. तोच आयु आणि अन्नही देतो.२२. सकल विश्वाचा जनक, पालक आणि संहारक अशा त्या परमेश्वराची शहाणा वा निर्बुद्ध, राजा वा रंक या सर्वावर एकसारखीच कृपादृष्टी असते. तूं शोक करूं नकोस. (शोक म्हणजे आपल्याला हव्याशा वस्तू, माणसे इत्यादींच्या वियोगाने होणारा मनाचा संताप) हा प्रभूच तारणहार आहे.'२३.

**इत्याश्वास्य वधूं विप्रो मूलमुत्खाय तत्र सः । अर्थपूर्णं घटं लेभे सद्गुरोः संप्रसादतः ।।२४।।**
**सभार्योऽथ द्विजो गत्वा शशंस गुरवे तु तत् । स प्राह दम्पती गोप्यमिदं श्रीर्नान्यथा ध्रुवा ।।२५।।**
**ऐश्वर्यपुत्रपौत्राढ्यौ संभूयात्र निरामयौ । मोक्षं गमिष्यथो नूनं गन्तव्यं सुखमालयम् ।।२६।।**

इति वधूं आश्वास्य विप्रः मूलं उत्खाय तत्र सः सद्गुरोः संप्रसादतः अर्थपूर्णं घटं लेभे।२४। अथ द्विजः सभार्यः गुरवे गत्वा तत् तु शशंस। सः प्राह, (हे) दम्पती, इदं गोप्यम्। अन्यथा श्रीः न ध्रुवा।२५। अत्र ऐश्वर्य+पुत्र+पौत्र+आढ्यौ निरामयौ संभूय नूनं मोक्षं गमिष्यथः। सुखं आलयं गन्तव्यम्।२६।

अशी आपल्या बायकोची समजून काढून त्याने तोडलेल्या वेलीचे मूळ खोदून काढले. तिथे त्या सद्गुरूंच्या मंगल प्रसादाने द्रव्याने भरलेला घडा मिळाला. इथे अशी शंका उपस्थित होते की अर्थ म्हणजे धन हे अनर्थाचे मूळ आहे असे असतां तो सद्गुरूंचा मंगल प्रसाद कसा मानावा? अर्थ हा अनर्थ आहे खरा; पण तो विषयभोगांत आसक्त असणाऱ्यांना किंवा कवडीचुंबकांना. चित्त शुद्ध असणाऱ्या भगवद्भक्तांना तेच धन यज्ञादि सत्कर्मांनी दैवी संपत्तीच्या प्राप्तीचे साधन होतो. यासाठी तो श्रीगुरूंचा संप्रसाद म्हटलेला आहे.२४. मग तो ब्राह्मण आपल्या पत्नीसह श्रीगुरूंकडे गेला. त्याने आपल्याला धन प्राप्त झाल्याचे त्यांना सागितले. त्यावर ते म्हणाले, 'तुम्ही उभयतांनी ही गोष्ट गुप्त ठेवावी. अन्यथा ही लक्ष्मी टिकणार नाही.२५. इथे भूलोकी पुत्र-पौत्रांसह ऐश्वर्य तसेच आरोग्य भोगून अंती निश्चितपणे मुक्ती पावाल.' या वेळी त्या दंपतीने श्रीगुरूंच्या चरणांशीच राहून सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावर त्यांना 'आतां सुखाने घरी जा,' असे सांगून निरोप दिला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ते पती-पत्नी आपल्या घरी गेले आणि श्रीगुरूंच्या आशीर्वचनाप्रमाणेच ऐहिक भोग भोगून अंती मोक्ष पावले.२६.

**।। नामधारक उवाच ।।**

**भिक्षावृत्तिः प्रभोः कस्मात्कल्पद्रुम उदुंबरः । सति पूज्यतमेऽश्वत्थे कुतो भगवता श्रितः ।।२७।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**पक्वान्नभिक्षुको भिक्षुरिति श्रुतमतं प्रभुः । भिक्षुः सन्लीलया भेजे शम्भुवृत्तिरियं पुनः ।।२८।।**

नामधारक उवाच। 'प्रभोः भिक्षावृत्तिः कस्मात्? उदुंबरः कस्मात् कल्पद्रुमः? पूज्यतमे अश्वत्थे सति भगवता (उदुंबरः) कुतः श्रितः?'२७। प्रभुः लीलया भिक्षुः सन् भिक्षुः पक्वान्नभिक्षुकः इति श्रुतमतं भेजे। पुनः इयं शम्भु+वृत्तिः।२८।

ही कथा ऐकल्यावर नामधारकाने आपल्या मनांत उठलेले तीन प्रश्न सिद्धमुनींना विचारले आहेत. 'आपल्या भक्तांना सर्व ऐश्वर्याचे दान करणारे प्रभू भिक्षावृत्तीचा अवलंब कां करतात? औदुंबर वृक्षाला कल्पवृक्षाची योग्यता कशी आली? तसेच स्वतः भगवंतांनी आपली विभूती म्हणून गौरविलेला पिंपळ (भ.गीता ११:२६) सोडून उंबराचा आश्रय कां घेतला?'२७. **प्रभूंची भिक्षावृत्ती -** भगवंतांनी लीलेने यतिवेष घेतला असल्याने आणि संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी सिद्ध अन्नाची भिक्षा मागावी (पराशर स्मृति १:४६) अशा श्रवणाने झालेल्या मताचा अंगीकार केला. **श्रुतमत** म्हणजे बृहदारण्यक उपनिषदाचे आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी पुत्रैषणा, वित्तैषणा, लोकैषणा या तिन्हींचा परित्याग करून भिक्षेची वृत्ती अवलंब करावी हे मत (३:५:१) असाही होतो. याशिवाय शं म्हणजे सुख ते जिच्यापासून होते ती शंभू वृत्ती; अर्थात् सुखपर्यवसायी वृत्ती. *'भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः। भिक्षाहारी प्रकुरुते सोमपानं दिने दिने।।'* (भिक्षान्न सेवन करणारा हा निराहारी असतो. भिक्षा हा प्रतिग्रह मुळीच नाही. भिक्षेवर निर्वाह करणारा प्रतिदिन सोमपान करतो.) अशी स्मृति आहे. श्रीदासबोधांत समर्थ रामदासस्वामी म्हणतात, *'भिक्षा मागोन जो जेविला। तो निराहारी बोलिला। प्रतिग्रहावेगळा जाला। भिक्षा मागतां।।२।। संतासंत जे जन। तेथें कोरान्न मागोन करी भोजन। तेणें केलें अमृतप्राशन। प्रतिदिनीं।।३।।'* (१४:२).२८.

**नखा नृसिंहावतारे विषार्ता दैत्यदारणात् । शान्ता औदुम्बरैः सोऽथ प्रीत्यानेन सदाश्रितः ।।२९।।**
**यत्र क्वाप्येष कल्पद्रुर्भूयात्तापाघदैन्यहृत् । कामदोऽहं श्रियात्रासमिति तस्मै वरोऽर्पितः ।।३०।।**
**विश्वात्मा यत्र तत्रैव वेदतीर्थामरा अपि । सन्त्युदुम्बर एवात्र कल्पद्रुर्भुवि नापरः ।।३१।।**
**तस्मादुदुम्बरतले भिक्षां कुत्रापि विश्वभृत् । अकृत्वा कामरूपाभिर्योगिनीभिः स्थितोऽर्चितः ।।३२।।**
**अज्ञानावृतविप्रास्तदज्ञात्वोचुः परस्परम् । कथं जीवत्यकृत्वायं भिक्षां मृग्यं तदद्य हि ।।३३।।**

नृसिंह अवतारे नखा दैत्य+दारणात् विष+आर्ताः (अभूवन्)। औदुम्बरैः शांता (जाताः)। अथ सः अनेन प्रीत्या सदा आश्रितः।२९। यत्र क्व अपि एष कल्प+द्रुः पाप+ताप+अघ+दैन्य+हृत् भूयात्। कामदः अहं श्रिया अत्र आसम् इति वरः तस्मै अर्पितः।३०। यत्र विश्व+आत्मा तत्र एव वेद+तीर्थ+अमराः अपि सन्ति। अत्र भुवि उदुम्बर एव कल्प+द्रुः न अपरः।३१। तस्मात् विश्व+भृत् कुत्र अपि भिक्षां अकृत्वा काम+रूपाभिः योगिनीभिः अर्चितः उदुम्बर+तले स्थितः।३२। अज्ञान+आवृत+विप्राः तत् अज्ञात्वा परस्परं ऊचुः। अयं भिक्षां अकृत्वा कथं जीवति? तत् अद्य हि मृग्यम्।३३।

**औदुंबरमाहात्म्य -** आतां सिद्धमुनि दुसऱ्या - औदुम्बरसंबंधी प्रश्नाचे उत्तर देत आहेत. नरसिंह अवतारांत ह्या भगवंताची नखे हिरण्यकशिपूचे पोट फाडतांना त्यांतील दाहक विषाने भाजली. त्या वेळी लक्ष्मीमातेने आणलेल्या उंबराच्या फळांनी तो दाह शमून नखे शांत झाली. तेव्हांपासून औदुम्बर वृक्ष देवाला प्रिय झाला आणि ते सदा त्याच्याखाली राहूं लागले.२९. जेथे कुठे - वाडीत, खेड्यांत, क्षेत्रांत, हा कल्पवृक्ष असेल तिथे तो पाप, ताप, दैन्य यांचा हारक होईल. भक्तांच्या कामना पुरविणारा मीहि, लक्ष्मीसह तेथे वास करीन असा वर त्या वृक्षाला देवाने दिला. विश्वात्मा हरी जिथे राहतो त्या औदुम्बरांतच वेद, तीर्थे आणि देवांचाही वास आहेच. त्यामुळे ह्या पृथ्वीतलावर औदुम्बरच कल्पवृक्ष आहे. दुसरा कोणताही वृक्ष नाही.३१. त्यामुळे, किंवा अमरापुरांत घेवड्याच्या भाजीची भिक्षा केल्या दिवसापासून, विश्वंभर श्रीगुरू कुठेही भिक्षा न घेतां औदुंबराच्या तळवटीच इच्छेप्रमाणे रूप धारण करणाऱ्या चौसष्ट योगिनींची पूजा घेत राहिले.३२. त्या गांवच्या अज्ञानी ब्राह्मणांना हे न कळल्यामुळे ते परस्परांत बोलूं लागले, ‘हा संन्यासी भिक्षेवांचून कसा जगतो याचा आजच शोध घेऊं या!’३३.

**इत्थं विचार्य तस्थुस्ते मध्याह्ने योगिमायया । त्रस्ता ग्रामं ययुः कोऽपि ज्ञातुं शक्योऽस्य चेष्टितम् ।।३४।।**
**श्रीगुरुं द्रष्टुमागत्य भाविको भक्तिभावनम् । गङ्गानुजाख्यभक्तोऽत्र दृष्टवान् चित्रमेकदा ।।३५।।**
**जलपूर्णाऽपि कृष्णाऽदान्मार्गं तेनागमत्प्रभुः । ददर्शान्वेत्य भक्तोऽपि पुरीं दिव्यामिवान्तरे ।।३६।।**
**नीराजितो योगिनीभी रत्नसिंहासनस्थितः । स्वर्चितः प्रेक्ष्य तं देवः प्राह कोऽस्यागतः कुतः।।३७।।**

इत्थं विचार्य ते विलीय तस्थुः। मध्य+अह्ने योगि+मायया त्रस्ता ग्रामं ययुः। अस्य चेष्टितं कः अपि ज्ञातुं शक्यते?३४। एकदा गङ्गानुज+आख्यः भाविकः भक्तः भक्तिभावनं श्रीगुरुं द्रष्टुं आगत्य चित्रं दृष्टवान्।३५। जलपूर्णा अपि कृष्णा मार्गं अदात्। तेन प्रभुः आगमत्। अनु एत्य भक्तः अपि अंतरे दिव्यां इव पुरीं ददर्श।३६। रत्नसिंहासनस्थः स्वर्चितः योगिनीभिः नीराजितः देवः तं प्रेक्ष्य प्राह, 'कः असि? कुतः आगतः?'३७।

असा विचार करून ते ब्राह्मण श्रीगुरूंवर लक्ष ठेवून लपून बसले. पण दुपारच्या वेळी ईश्वराच्या मायेने भ्रमित होऊन घाबरून घरी गेले. ह्या भगवंताची लीला कधी कुणाला जाणतां आली आहे काय?३४. एकदां गंगानुज नांवाचा एक भाविक भक्त, भक्तिगम्य श्रीगुरूंच्या दर्शनासाठी आला असतां त्याने एक चमत्कार पाहिला.३५. कृष्णा नदी पाण्याने दुथडी भरलेली असूनही तिने श्रीगुरूंना वाट करून दिली आणि त्या मार्गाने प्रभू आत गेले. भक्तही त्यांच्या मागे गेला असतां त्याने नदीच्या आंत एक जणु बेट आहे आणि त्यावर एक अमरावतीसारखी दिव्य नगरी पाहिली.३६. तिथे चौसष्ट योगनींनी श्रीगुरूंना रत्नजडित सिंहासनावर बसवून त्यांची पूजा आणि आरती केलेली त्याने पाहिली. इतक्यांत श्रीगुरूंनी त्याला पाहिले आणि विचारले की, 'तूं कोण आहेस? आणि इथे कशासाठी आला आहेस?' ३७.

### ।। गङ्गानुज उवाच ।।

**गङ्गानुजाभिधोऽहं त्वामत्रत्यो द्रष्टुमन्वगाम् । भवान्परात्मा सर्वेशो दैवान्मेऽद्यात्र गोचरः ।।३८।।**
**त्वन्मायामोहितात्मानस् त्वां विदुः केवलं नरम् । संसारसागरेऽपारे तेऽतो मज्जन्ति नेतरे ।।३९।।**
**इति प्रेम्णा स्तुतस्तस्मै हृद्यं दत्वेश्वरोऽब्रवीत् । मयि सत्यत्र यद्दृष्टं नाख्येयं कस्यचित्त्वया ।।४०।।**

'अहं गङ्गानुज+अभिधः अत्रत्यः त्वां द्रष्टुं अनु अगाम्। भवान् परात्मा सर्वेशः मे अद्य अत्र दैवात् गोचरः (जातः)'।३८। 'त्वत्+माया+मोहित+आत्मानः (ये) त्वां केवलं नरं विदुः ते अपारे संसार+सागरे मज्जन्ति। न इतरे।'३९। इति प्रेम्णा स्तुतः ईश्वरः तस्मै हृद्यं दत्वा अब्रवीत्। 'त्वया यत् दृष्टं मयि अत्र सति न कस्यचित् आख्येयम्।'४०।

'माझे नांव गंगानुज असून मी याच गांवचा (औरवाडचा) राहणारा आहे. आपल्या दर्शनासाठी आपल्या मागे आलो. आपण साक्षात् परमात्मा आणि परमेश्वर आहांत. माझ्या पूर्वपुण्याईच्या परिपाकाने जागलेल्या अनन्य भक्तीमुळे मला आज या ठिकाणी आपले दर्शन झाले आहे.' गंगानुजाला असे दुर्लभ दर्शन होण्याचे कारण श्रीस्वामिमहाराज श्रीमद्भगवद्गीतेच्या (८:२२) आधारे देत आहेत. 'हे अर्जुना, तो परम पुरुष केवळ अनन्य भक्तीनेच पावतो.' (*'पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।'*)३८. 'तुझ्या मायेने ज्यांच्या मनाला मोह झालेला आहे त्यामुळे जे अज्ञानवश तुला केवळ मानव समजतात ते ह्या दुस्तर संसारसागराचा पार (ब्रह्म) न पावल्याने त्यांतच गटांगळ्या खातात. इतर तुझे स्वरूप जाणणारे तुझे भक्त मात्र संसारसागर तरून जातात.'३९. अशा प्रेमभराने केलेल्या स्तुतीने प्रसन्न होऊन श्रीगुरुस्वरूप ईश्वराने त्याला त्याचा अभीष्ट वर देऊन सांगितले की, 'तूं हे जे आज इथे पाहिलेस ते मी या ठिकाणी (ह्या रूपाने) असेपर्यंत कुणालाही सांगूं नकोस.' मी इथून गेल्यावर मात्र सांगायला हरकत नाही असे अर्थातच यांत सूचित केले आहे.४०.

**इत्युक्तो गुरुणा हृष्टो भक्तः क्षेत्रं स्वमेत्य सः । लेभेऽसम्भाव्यसस्यर्धिं लोके श्रैष्ठ्यं च संविदम् ।।४१।।**
**स एत्य नित्यमानर्च गुरुं प्राहैकदा गुरो । काश्यां तु त्रिस्थलीयात्रा वरेत्याहुर्न वेद्मि ताम् ।।४२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**प्रयागः संगमः काशीयं गया करवीरपूः । दर्शयामीदमेतद्वत् त्रिस्थलं ते द्रुतं परम् ।।४३।।**
**इत्युक्त्वा धारयित्वा स्वपादुके त्रिस्थलीं त्विमाम् । प्रयागकाश्यौ गयां च दर्शयित्वागमत्क्षणात् ।।४४।।**

इति गुरुणा उक्तः हृष्टः सः भक्तः स्वं क्षेत्रं एत्य असम्भाव्य+सस्य+ऋद्धिं, लोके श्रैष्ठ्यं संविदं च लेभे।४१। सः नित्यं गुरुं एत्य आनर्च। एकदा सः प्राह, '(हे) गुरो! काश्यां त्रि+स्थली+यात्रा तु वरा इति आहुः। तां न वेद्मि।'४२। श्रीगुरुः उवाच। '(अयं) संगमः प्रयागः, इयं काशी, करवीरपूः गया। इदं दर्शयामि। एतत्+वत् (अ)परं त्रिस्थलं ते द्रुतं दर्शयामि।'४३। इति उक्त्वा स्वपादुके धारयित्वा, 'इमां त्रिस्थलीं तु', प्रयाग+काश्यौ गयां च क्षणात् दर्शयित्वा आगमत्।४४।

श्रीगुरूंशी असा संवाद केल्यावर आनंदभरित झालेला तो भक्त आपल्या शेतीवर परतला. त्याच्या शेतांत त्याला कल्पनेबाहेर पीक आले. समजांतही त्याला मानमान्यता मिळाली आणि आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक करणारी बुद्धी प्राप्त होऊन तो ब्रह्मज्ञानी झाला.४१. तो गंगानुज नांवाचा शेतकरी रोज औदुंबराला येऊन श्रीगुरूंची पूजा करीत असे. एकदां त्याने त्यांना प्रश्न केला, 'गुरुमहाराज, काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा श्रेष्ठ आहे असे म्हणतात ती मी जाणत नाही.' काशीक्षेत्रांत त्रिस्थली यात्रा नाही; पण त्याच्याच पुढील बोलण्यावरून तो अज्ञानानेच तसे बोलतो आहे हे स्पष्ट आहे.४२. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'हा कृष्णापंचगंगासंगमच प्रयाग आहे; त्यापुढे कृष्णेतील युगालय नावाचे क्षेत्र हीच काशी आहे; तसेच कोल्हापूर हीच गया आहे. ही त्रिस्थळी तुला दाखवितो. तशीच दुसरीही त्रिस्थळीही लगेच दाखवितो.'४३. असे बोलून आणि त्याला आपल्या पादुका धरायला लावून त्याला योगगतीने नेऊन ही (संगम-युगालय-कोल्हापूर) त्रिस्थळी तर दाखविलीच पण प्रयाग, काशी आणि गया ह्या ठिकाणीही नेऊन तीसुद्धा त्रिस्थळी यात्रा घडविली आणि क्षणांत परत संगमावर आपल्या आश्रमांत आणून सोडले.४४.

**तमाह त्रिस्थली त्वेषा दर्शितान्यापि तादृशी । साम्यं ज्ञात्वोभयोरत्र स्वाचारान्मुक्तिमेष्यसि ।।४५।।**
**इति योगीशवाक्यं स श्रुत्वा ज्ञात्वाऽस्य चेष्टितम् । तद्ध्यानात्कर्मबन्धं द्राक् छित्वा मुक्तो बभूव ह ।।४६।।**
**वृद्धोऽत्र महिमा सन्त आयास्यन्तीतरेऽप्यतः । गन्तव्यं क्वापि न स्थेयं साक्षादत्रेत्यमंस्त सः ।।४७।।**

तं आह, 'एषा तु त्रिस्थली दर्शिता, अन्या अपि तादृशी (दर्शिता)। उभयोः साम्यं ज्ञात्वा अत्र स्व+आचारान् मुक्तिं एष्यसि।'४५। इति योगी+ईश+वाक्यं श्रुत्वा, अस्य चेष्टितं ज्ञात्वा, तद्+ध्यानात् कर्म+बन्धं द्राक् छित्वा मुक्तः बभूव ह ।४६। अत्र महिमा वृद्धः। सन्तः, इतरे अपि आयास्यन्ति। अतः अत्र साक्षात् न स्थेयं (अन्यत्र) क्व अपि गन्तव्यं इति सः अमंस्त।४७।

मग श्रीगुरु त्या गंगानुजाला म्हणाले, 'तुला ही त्रिस्थळी आणि तशीच दुसरीही त्रिस्थळी दाखविली. या दोन्हींचे साम्य जाणून तूं आपला विहित आचार करून मुक्ती पावशील.' स्वाचार शब्दाने इथे शास्त्रानुसार विहित आचाराचे निष्काम अनुष्ठान अभिप्रेत आहे.४५. असे त्या योगिराज श्रीगुरूंचे वचन ऐकून, त्यांच्या अलौकिक लीलांचे चिंतन आणि श्रीगुरूंचे ध्यान ह्यांच्या प्रभावाने आपल्या कर्मबंधनाचा शीघ्रच छेद करून तो गंगानुज मुक्त झाला.४६. 'इथे महिमा खूपच वाढला आहे. आतां साधुजनांबरोबरच इतरही मतलबी लोकांची गर्दी वाढेल. तरी आपण आतां इथे ह्या प्रत्यक्ष रूपाने न राहतां अन्यत्र कुठे तरी जावे,' असा त्यांनी (श्रीगुरूंनी) विचार केला. बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२३) तर 'या ब्रह्मनिष्ठाचा महिमा नित्य आहे तो कर्मामुळे न वाढतो न घटतो,' असे म्हटले आहे. मग इथे महिमा वाढला हे म्हणणे त्याशी विसंगत नाही कां? ह्या आक्षेपाचे उत्तर श्रीस्वामिमहाराजांनी असे दिले आहे की, सच्चिदानंदस्वरूप निर्गुण ब्रह्माच्या महिमानाची कर्मामुळे वृद्धी वा क्षय होत नाही हे खरेच आहे. सगुण ब्रह्माच्या विषयी मात्र लोकांना जसजसे अनुभव येतात त्यानुसार तसतसे त्यांच्या लेखी माहात्म्य वाढते. वस्तुतः श्रुतीचेच प्रतिपादन सयुक्तिक आहे.४७.

**नो हित्वाद्य क्व यासीति विलपन्तीः स योगिनीः । आश्वास्योचेऽत्र तिष्ठामि लोकदृष्ट्या गमिष्य इत् ।।४८।।**
**अमरेशोऽन्नपूर्णात्र विघ्नेशो युष्मदादयः । भक्तेष्टदा मयाऽप्यत्र स्थेयं वस्तुष्टये सदा ।।४९।।**
**इतः प्रभृत्यदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति । बहुलोकनिवासोऽत्र यास्यन्त्यत्र जनाः सुखम् ।।५०।।**

नः हित्वा क्व यासि? इति विलपन्तीः योगिनीः सः आश्वास्य ऊचे, लोकदृष्ट्या गमिष्ये, अत्र तिष्ठामि।४८। इतः प्रभृति अदः क्षेत्रं सुप्रसिद्धं भविष्यति। बहुलोकनिवासः। जनाः सुखं यास्यन्ति। ४९। अत्र अमरेशः, अन्नपूर्णा, विघ्नेशः, युष्मदादयः भक्त+इष्टदाः। वः तुष्टये मया अपि अत्र सदा स्थेयम्।५०।

श्रीगुरूंच्या ह्या संकल्पाने दुःखित झालेल्या योगिनींनी कळवळून त्यांना विनविले, 'आम्हांला सोडून कुठे जातां?' त्यावर त्यांची समजूत घालीत श्रीगुरू म्हणाले, 'योगिनींनो, मी मानवरूपाने अवतार घेतला आहे त्यानुसार लोकांच्या दृष्टीने मी जात असलो तरी खरोखर मी इथेच तुमच्याजवळ राहणार आहे. मी सर्वव्यापी असल्याने माझे कुठे जाणे वा येणे संभवतच नाही.'४८. इथून पुढे हे क्षेत्र सुप्रसिद्ध होईल. इथे खूप लोक राहतील. दुःखी असलेले लोकही इथे येऊन त्या स्थानाच्या प्रभावाने सुख पावतील. **सुखं** या शब्दाचा अर्थ इथे परमानंद किंवा ब्रह्मानंद असा केला आहे. ह्याला छांदोग्य उपनिषदाचा (४:१०:५) आधार घेतला आहे. *'यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव खं'* जे आकाश ते सुख म्हणजे आकाशविशिष्ट सुख. यांत अन्य इंद्रियजन्य सुखाचा अंतर्भाव होत नाही. जसे नीलकमल असे म्हटल्यावर निळ्या नसणाऱ्या, लाल-पिवळ्या कमळांचा अंतर्भाव होत नाही. *'यदेव खं तदेव खं'* या पदांत सुखाला आकाशाचे विशेषण करून सुखविशिष्ट आकाश हे भौतिक अचेतन आकाशापेक्षां भिन्न दाखविले आहे. यांवरून हार्दाकाशाचा किंवा अंतराकाशाचा बोध होतो. अंतराकाशांत अनुभवाला येणारे अतींद्रिय सुख म्हणजेच ब्रह्मानंद असा निष्कर्ष निघतो.४९. इथे अमरेश्वर, अन्नपूर्णा, विघ्नराज आणि योगिनीप्रमुख तुम्ही सर्व देवता भक्तांच्या इष्ट कामना पुरवीत असाल. तुमच्या संतोषासाठी मलाही सदैव इथे राहावेच लागेल.५०.

**सन्निपाताक्षिरुङ्मेह-कुष्ठश्लेष्मक्षयज्वरान् । वातपैत्तिकगुल्माद्यान् देशाद्युत्थान्हरेदिदम् ।।५१।।**
**पुत्रं वन्ध्याऽभयं त्रस्तो निःस्वः स्वं रोग्यनामयम् । मुमुक्षुः सद्गतिं यद्यद्यस्येष्टं स लभेत्सदा ।।५२।।**
**सहस्रगोदानफलं पर्वक्रान्तिग्रहाप्लुतौ । नुः कोटिफलमत्राल्प-जपहोमसुरार्चनैः ।।५३।।**
**प्रदक्षिणाऽश्वमेधादि-फलदा नुः पदे पदे । दुर्गताः पितरोऽप्यत्र श्राद्धाद्यान्ति परां गतिम् ।।५४।।**
**इत्याश्वास्य स योगिनीः परतरः कल्पद्रुमूलेऽमले । संस्थाप्य स्वसुपादुके नर इह स्नात्वार्चयेदष्टसु ।।**
**तीर्थेष्वीश्वरयोगिनीसुरयुते मत्पादुके द्राग्लभेत् । सोऽभीष्टं त्विति ताः प्रभाष्य स ययौ भीमातटं योगिराट् ।।५५।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे कृष्णापञ्चनदीसङ्गमोत्कर्षकथनं नामैकादशोऽध्यायः ।।११।।**

सन्निपात+अक्षिरुक्+मेह+कुष्ठ+श्लेष्म+क्षय+ज्वरान् वात+पैत्तिक+गुल्म+आद्यान् देशादि उत्थान् इदं हरेत्।५१। वन्ध्या पुत्रं, त्रस्तो अभयं, निःस्वः स्वं रोगी अनामयं, मुमुक्षुः सद्गतिं, यत् यत् यस्य इष्टं सः सदा लभेत्।५२। पर्व+क्रान्ति+ग्रह+आप्लुतौ सहस्र+गो+दान+फलम्। अत्र अल्प+जप+होम+सुर+अर्चनैः नुः कोटिफलम्।५३। प्रदक्षिणा नुः पदे पदे अश्वमेधादि फलदा। दुर्गताः पितरा अपि अत्र श्राद्धात् परां गतिं यान्ति।५४। इति योगिनीः आश्वास्य सः परतरः अमले कल्पद्रु+मूले स्व+सुपादुके संस्थाप्य, '(यो) नरः इह अष्टसु तीर्थेषु स्नात्वा ईश्वर+योगिनी+सुर+युते मत्पादुके अर्चयेत् सः द्राक् अभीष्टं लभेत्।' इति ताः प्रभाष्य सः योगिराट् भीमा+तटं ययौ।५५।

सन्निपात, नेत्ररोग, मूत्रविकार, कुष्ठ, कफ, क्षय, ज्वर, वात, पित्त, गुल्म इत्यादि विकार तसेच महामारीसारखे सांसर्गिक रोगही ह्या क्षेत्राच्या प्रभावाने कसल्याही चिकित्सेविना दूर होतील.५१. वांझेला मूल, पीडिताला अभय, निर्धनाला धन, रोग्याला आरोग्य, मुमुक्षूंना सद्गती, ज्याला ज्याला ज्याची इच्छा असेल ते त्याला नेहमीच लाभेल.५२. दर्शादि पर्वकाळी, मेषादि रविसंक्रमणांत, सूर्य-चंद्रग्रहणांत इथे स्नान केल्याने हजार गाई दान केल्याचे फळ लाभेल. थोड्याही प्रमाणांत केलेल्या जप, होम आणि देवपूजा यांचे कोटीपट फळ मनुष्याला लाभेल.५३. येथे प्रदक्षिणा

केल्याने पुरुषाला पावलोपावली अश्वमेधादि यज्ञाचे फळ मिळेल. एखाद्याचे पितर जरी नरकात असतील तरी इथे श्राद्ध केल्याने त्यांना उत्तम गती मिळेल.५४. असे त्या योगिनींना आश्वासन देऊन त्या परमात्म्याने औदुंबराच्या तळवटी आपल्या मनोहर पादुकांची स्थापना केली आणि म्हणाला, 'जो कोणी पुरुष (स्त्री) ह्या क्षेत्रांत अष्टतीर्थांत स्नान करून अमरेश्वर, चौसष्ट योगिनी आणि इतर देवतांची पूजा करील त्याच्या मनोकामनांची शीघ्र पूर्ती होईल.' मग ते योगिराज भीमातीरावर गाणगापूर येथे गेले.५५.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा अकरावा अध्याय इथे पूर्ण झाला.
तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# द्वादशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**गतेऽपि भगवत्यङ्ग कृष्णावेणीतटाश्रमात् । तस्मात्तत्रैव भजतां कार्यसिद्धिः कुतो वद ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गतिस्थित्यासनस्वप्ना न कदापि चिदात्मनि । लीलेयं मानुषी तस्य नरानुकृतिकारणः ।।२।।**

नामधारक उवाच। 'हे अङ्ग! भगवति कृष्णावेणी+तट+आश्रमांत् गते अपि तत्र एव भजतां कस्मात् कुतो कार्यसिद्धिः? वद।१। गति+स्थिति+आसन+स्वप्नाः चित्+आत्मनि कदा+अपि न। इयं तस्य नर+अनुकृति+कारणः मानुषी लीला।२।

*श्रीगणेशाय नमः। भूतबाधा निरसुनी ब्राह्मणीते पुत्र दिला। द्वादशाध्यायी श्रीगुरूंनी मृतपुत्रहि जीवविला।।१।।* अशा रीतीने गुरुकृपा झालेल्या विषयासक्त शिष्यांनाही श्रीगुरूंच्या कृपाप्रसादाने ऐहिक आणि पारलौकिक सिद्धी प्राप्त होतात हे मागच्या अध्यायांत सांगितले. आतां या अध्यायांत भजनाची आवड उपजविण्यासाठी त्याच सगुणरूपधारी श्रीगुरूंच्या भक्तवात्सल्याचे निरूपण करीत आहेत. नामधारक सिद्धमुनींना विचारतात. अहो सिद्धमुनी, भगवान तर कृष्णावेणीच्या तटावरील आश्रमांतून गाणगापूरला निघून गेले. तरीही तिथेच यज्ञ-दान-तप इत्यादि उपासना करणाऱ्या भक्तांना कोणत्या दैवताकडून आणि केव्हांपासून फळ मिळाले? श्रीगुरू तर तिथे नव्हते. मग त्यांच्या भक्तांची कार्ये कशी सफळ झाली?१. नामधारकाच्या या प्रश्नाचे उत्तर उदाहरणासहित देत आहेत. उदाहरण म्हणजे सार्वत्रिक नियम सिद्ध करण्यासाठी एका अंशाचे परीक्षण. जशी शितावरून भाताची परीक्षा. **गती** म्हणजे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे; **स्थिती** म्हणजे एकाच स्थळी राहणे; **आसन** म्हणजे बसून राहणे; आणि **स्वप्न** म्हणजे निजणे. हे सगळे आत्म्याचे धर्म नाहीत. चैतन्यस्वरूप श्रीगुरूंच्या ठिकाणी संभवत नाहीत.

**भाव्यतेऽजो भावनया यद्वत्तद्वद्विभात्यसौ । एवं यद्भावनात्रेदृक् तादृग्जागर्ति तत्र सः ।।३।।**
**योगिनीवरदानादि यैर्यैर्गङ्गानुजाच्छ्रुतम् । ते ते भक्त्याभजंस्तत्र तं स तत्कामदोऽभवत् ।।४।।**

यैः यैः गङ्गानुजात् योगिनी+वर+दानादि श्रुतं ते ते भक्त्या तत्र अभजन्। तं सः कामदः अभवत्।३। अजः भावनया यद्+वत् भाव्यते तद्+वत् असौ भाति। एवं अत्र ईदृक् यत् भावना तत्र तादृक् जागर्ति।४।

'हे निर्गुण परमात्म्याच्या विषयी ठीक आहे. स्वेच्छेने कां होईना सगुण रूप धारण केलेल्या श्रीगुरूंना हे सर्व धर्म असणारच की.' या शंकेचे समाधान असे केले आहे की सत्य-ज्ञान-अनंत-आनंद यांच्या एकरसाने आपल्या नित्य षड्गुण ऐश्वर्यासहित अवतरलेल्या श्रीगुरूंचा देहादि उपाधीशी संपर्कच होऊं शकत नाही. तेव्हां हे सर्व शरीरधर्म त्यांना स्पर्शूं शकत नाही. मग 'ते भामीतीरी गेले,' असे तुम्हीच म्हणाला, त्याची काय वाट? तर स्वेच्छेने मनुष्यरूप घेतलेल्या सद्गुरूंची ही जाणे-येणे इत्यादि मानवी लीला - नाटक, आहे. निर्गुण ब्रह्म स्वतः एकमेवाद्वितीय असून, चलनादिरहित आहे; तरी एका ठिकाणीच राहूनही इतर धांवणाऱ्या इंद्रियादिकांच्या पलीकडे जातेच ना? *'अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत्। तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति'* (ईशावास्य उ. ४) ब्रह्मानंदकृत ईशावास्यभाष्यरहस्यांत ब्रह्म-विष्णू-शिव या रूपांतील परब्रह्म मायेमुळे साकारते त्याला *'तदेजति'* म्हटले आहे. वस्तुतः परब्रह्म निराकार आणि निश्चलच आहे. चलनाचा आभास उपाधीमुळे आहे. *'तन्नैजति'* या पदाने प्रकृतीच्या पलीकडील निर्गुण ब्रह्माचा बोध होतो.'२. परमेश्वराविषयी ज्याचा जसा भाव तसाच त्याला तो भासतो. त्यानुसार जिथे असा 'फलदाता भगवंत साक्षात् नांदत आहे,' अशी भावना उत्पन्न होते तिथे त्या भावाला अनुसरूनच तो जागतो - इष्टफळ देण्याला सदैव उन्मुख असतो. अशा रीतीने परमार्थांत काय किंवा व्यवहारांत काय ज्याचे जसे जसे ज्ञान असेल त्याला तसेच फळ मिळते. तैत्तिरीय उपनिषदाच्या वचनानुसार (२:६:१) ब्रह्म नाही असे जो म्हणतो तो असतच होतो. ब्रह्माचे अस्तित्वाला मानणारा संत जाणला जातो.'

**शृण्वेवं सति तत्रत्या मृतापत्यत्वदुःखिता । काचिद् द्विजसती विप्रान्स्वस्त्यर्थं शरणं ययौ ।।५।।**
**प्रपन्नां प्रेक्ष्य तां दीनां निजभक्तिविधित्सया । देवप्रेरितधीः कश्चित्तद्दैवं भूसुरोऽब्रवीत् ।।६।।**
**मृतापत्यत्वदोषांस्तु शृणु साध्वि पुरार्जितान् । मृतापत्यत्वादिदोषाः प्रायशः प्रेतहेतवः ।।७।।**

शृणु।' एवं सति तत्रत्या मृत+अपत्यत्व+दुःखिता काचित् द्विजसती स्वस्त्यर्थं विप्रान् शरणं ययौ।५। तां दीनां प्रपन्नां प्रेक्ष्य निज+भक्ति+विधत्सया कश्चित् भूसुरः तत्+दैवं अब्रवीत्।६। (हे) साध्वी, शृणु। मृत+अपत्य+दोषान् तु पुरा अर्जितान्। प्रायशः मृत+अपत्य+दोषाः प्रेत+हेतवः।७।

यावर श्रीमच्छंकराचार्यांचे भाष्य असे आहे, जो ब्रह्माचे (परमात्म्याचे) अस्तित्व मानीत नाही त्याची सर्व सन्मार्गावर, वर्णाश्रमधर्मावर श्रद्धा राहत नाही. साहजिकच तो ईश्वराला विमुख होऊन नास्तिक होतो आणि लोकांत असाधू गणला जातो. त्याच्या उलट जो ब्रह्म आहे असे म्हणतो तो ब्रह्माकडे - ईश्वराकडे नेणाऱ्या वर्णाश्रमधर्मादि सन्मार्गांवर श्रद्धा ठेवून तसे आचरण करतो. साहजिकच साधुजन त्याला सन्मार्गावर चालणारा - संत असे ओळखतात.३. ज्यानी ज्यांनी गंगानुजाकडून योगिनींना श्रीगुरूंनी दिलेले वरदान इत्यादि वृत्त ऐकले त्यांनी त्यांनी त्या पादुकांची भक्तीपूर्वक उपासना केली. त्या सर्वांच्या कामना भगवंतांनी पूर्ण केल्या.४. सिद्धमुनी नामधारकाला म्हणतात, ऐक! असा क्रम तिथे चालू असतां तेथील (नजीकच्या शिरोळ गांवातील) एक जन्मतः होणाऱ्या अर्भकांच्या मृत्यूमुळे त्रस्त असलेली एक ब्राह्मणस्त्री ब्राह्मणांना शरण गेली आणि तिने आपली मुले वाचविण्याचा उपाय विचारला.५.

**ब्रह्महा भ्रूणहा वाऽपि गोघ्नोऽश्वघ्नोऽपरार्थहृत् । ब्रह्मस्वात्स्वर्णहा पापी लभेज्जन्मान्तरे त्विदम् ।।८।।**
**लोहाश्मदारुचूर्णानि प्रयत्नाज्जरयेत्पुमान् । ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति ।।९।।**
**हृतस्वार्थाभिलाषेण चेन्मृतो ब्राह्मणः स तु । गत्वा पिशाचतां स्वार्थी सदा स्याद्धर्तृवंशहा ।।१०।।**

ब्रह्महा, भ्रूणहा वा, गोघ्नः, अश्वघ्नः अपि, अपर+अर्थ+हृत्, ब्रह्म+स्व+अत्, स्वर्ण+हा पापी तु जन्म+अंतरे इदं लभेत्।८। हृत+स्व+अर्थ+अभिलाषेण ब्राह्मणः मृतः चेत् स तु स्वार्थी पिशाचतां गत्वा सदा हर्तृ+वंश+हा स्यात्।९। लोह+अश्म+दारु+चूर्णानि पुमान् प्रयत्नात् जरयेत्। ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति?१०।

त्या काकुळतीने विनवणी करणाऱ्या ब्राह्मणीला पाहून, तिला आपल्या भक्तीकडे आकृष्ट करण्यासाठी श्रीगुरूंनीच ज्याच्या बुद्धीला प्रेरणा केली होती अशा कुणा एका ब्राह्मणाने तिला तिच्या प्राक्तनाची कल्पना दिली. ज्योतिष्यादि शास्त्राच्या आधारे नव्हे तर श्रीगुरुप्रेरित बुद्धीने!६. प्रथमतः त्याने सामान्यतः जन्मतांच मुले मरण्याला कारण असलेल्या पापांविषयी सांगितले. 'हे दोष पूर्वजन्मार्जित असतात,' असे सांगून तो म्हणाला, 'हे दोष बहुतेक पिशाचबाधेमुळे घडतात.७. ब्राह्मणाची हत्या करणारा, स्त्रियांचे गर्भ किंवा अर्भक यांची हत्या करणारा, परद्रव्याचा अपहार करणारा, ब्राह्मणाच्या द्रव्याचा बळजबरीने अथवा चोरीने उपभोग घेणारा, सोन्याची चोरी करणारा किंवा अशीच इतर पापे करणाऱ्याला पुढच्या जन्मात हे मृत अर्भकाचे दुःख भोगावे लागते.' तु शब्दाने तशीच उत्कट पापे असतील तर हितोपदेशांत (मित्रलाभ कथा ३) सांगितल्याप्रमाणे या जन्मांतही असे दुःख प्राप्त होऊं शकते. (*'अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते।'*)८. सर्व पापांत ब्राह्मणाच्या द्रव्याचा अपहार मोठा असल्याचे सांगतात. लोखंड, दगड वा लाकूड यांचा चुराही कुणी प्रयत्नाने पचवूं शकतील. पण ब्राह्मणाकडून लुबाडलेले द्रव्य त्रैलोक्यांत कोण कसे पचवील? अर्थात् कुणीही पचवूं शकत नाही.९. आपल्या अपहार झालेल्या द्रव्याच्या लोभाने जर तो ब्राह्मण मृत झाला तर तो स्वार्थाभिलाषी पिशाच योनीत जातो आणि आपले द्रव्य लुबाडणाऱ्याच्या वंशच्छेद करतो.१०.

**त्वया भवान्तरे साध्वि हृतं शौनकगोत्रिणः । द्रव्यं विप्रस्य सोऽर्भांस्ते भूत्वा प्रेतो निहन्त्युत ।।११।।**
**भोगादेव क्षयः साध्वि नान्यथारब्धकर्मणः । तस्मात्प्रारब्धजफलं भुङ्क्ष्व कोऽत्र निवारकः ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा कर्णशूलाभं त्रस्तचित्ताऽब्रवीद् द्विजम् । भो ब्रह्मन्मानुगृह्णीष्व मुक्त्युपायमुपादिश ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्रेतौर्ध्वदेहिकं कर्म प्रायश्चित्तपुरःसरम् । कारयित्वाङ्ग भर्त्रा त्वं मासमात्रं व्रतं चर ।।१४।।**

(हे) साध्वि, त्वया भव+अंतरे शौनक+गोत्रिणः विप्रस्य द्रव्यं हृतम्। सः प्रेतः भूत्वा ते अर्भान् निहन्ति उत।११। (हे) साध्वि, आरब्ध+कर्मणा भोगात् एव क्षयः। न अन्यथा। तस्मात् प्रारब्धजं फलं भुङ्क्ष्व। अत्र कः निवारकः?१२। तत् कर्ण+शूलाभं श्रुत्वा त्रस्त+चित्ता द्विजं अब्रवीत्। भो ब्रह्मन्, मां अनुगृह्णीष्व, मुक्ति+उपायं उपादिश।१३। विप्र उवाच। प्रेत+और्ध्वदेहिकं प्रायश्चित्त+पुरःसरं कर्म भर्त्रा कारयित्वा त्वं मासमात्रं व्रतं चर।१४।

इथपर्यंत सामान्य शास्त्रार्थ सांगून आतां तो ब्राह्मण त्या स्त्रीचे विशिष्ट कर्म सांगत आहे. 'हे सती, तूं पूर्वजन्मी एका शौनकगोत्रीय ब्राह्मणाचे पैसे लुबाडले. तोच आतां पिशाच होऊन तुझी बाळे मारीत आहे.११. हे सती, आपण जन्माला येतांना बरोबर आणलेले कर्म - म्हणजे प्रारब्ध. ते भोगूनच संपवतां येते. दुसरा कांहीही उपाय नाही. तेव्हां तुझ्या प्रारब्धकर्माचे फळ भोग. त्याचा कोण प्रतिकार करूं शकेल? अर्थात् कुणीही नाही.'१२. ते कर्णकटु बोल ऐकून त्या ब्राह्मणीचे मन संत्रस्त झाले. ती त्या ब्राह्मणाला म्हणाली, 'अहो विप्रवर! ह्या दुःखांतून सुटण्याचा कांही उपाय आपण मला सांगावा.'१३. त्या ब्राह्मणाने तिला सांगितले, 'त्या पिशाच झालेल्या ब्राह्मणाचे शास्त्रोक्त पिंडदानादि अंत्यकर्म, नारायणबळी इत्यादी अनुष्ठानांसहित तुझ्या पतीकडून करवून घे आणि मी पुढे सांगणार असलेले व्रत एक महिनाभर कर.' पतीच्या द्वारा अंत्येष्ट्यादि कर्मे करवून घ्यायला सांगण्याचे कारण स्त्रियांना ते स्वतंत्रपणे करायला शास्त्राज्ञा नाही. 'पतिद्वारा करवून घे' ह्या सांगण्यांत स्त्रीच मुख्य कर्ता आहे असा अर्थ काढूं नये. पतीला सांगून ते करावे असा अर्थ विवक्षित आहे.१४.

**कृष्णापञ्चनदीयोगे स्नात्वा श्रीगुरुपादुकाम् । उदुम्बरं चाष्टतीर्थस्नानपूर्वं समर्चय ।।१५।।**
**ब्राह्मणान्भोजयित्वाथ शतद्रव्यं द्विजातये । देहि शौनकगोत्राय शुद्धिस्तेनैव ते सति ।।१६।।**

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**शतद्रव्यं कुतो लभ्यं मासमात्रं करोम्यहम् । सद्गुरोरर्चनं भक्त्या स मां पायाद्भयाद्धरिः ।।१७।।**
**इति निश्चित्य सा पत्या यथानिर्दिष्टमाचरत् । दिनत्रयान्तरे स्वप्ने तस्या विप्रपिशाचकः ।।१८।।**

कृष्णा+पंचनदी+योगे स्नात्वा, अष्ट+तीर्थ+स्नानपूर्वं श्रीगुरु+पादुकां उदुम्बरं च समर्चय।१५। अथ ब्राह्मणान् भोजयित्वा शौनक+द्विजातये शतद्रव्यं देहि। (हे) सति, तेन एव ते शुद्धिः (भविष्यति)।१६। ब्राह्मणी उवाच। शतद्रव्यं कुतो लभ्यम्? अहं मासमात्रं भक्त्या सद्गुरोः अर्चनं करोमि। सः हरिः मां भयात् पायात्।१७। इति निश्चित्य सा पत्या यथा+निर्दिष्टं आचरत्। दिन+त्रय+अंतरे तस्या स्वप्ने विप्र+पिशाचकः।१८।

प्रथम कृष्णा आणि पंचगंगा यांच्या संगमांत न्हाऊन मग अष्टतीर्थांत स्नाने करावीत आणि श्रीगुरूंच्या पादुकांची तसेच औदुंबर वृक्षाची विधिपूर्वक पूजा करावी.१५. 'एक महिनाभर असे व्रत आचरून यथाशक्ती ब्राह्मणांना भोजन घालून त्या प्रेतासाठी म्हणून शौनक गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला शंभर रौप्य मुद्रांचे दान कर. हे साध्वी, ह्यानेच तुझ्या पापाची निष्कृति होईल.'१६. ती ब्राह्मणी म्हणाली, 'शंभर रौप्यमुद्रा मी कुठून आणूं? मात्र एक महिनाभर मनोभावे मी सदगुरूंची पूजा करीन. तो हरीच माझे या पिशाचाच्या भयापासून रक्षण करो.'१७. असा मनाचा निश्चय करून त्या ब्राह्मणीने आपल्या पतीसह ब्राह्मणाने सांगितल्याप्रमाणे सर्व अनुष्ठान सुरूं केले. तीन दिवसांनी तिच्या स्वप्नांत येऊन एक ब्रह्मसमंध तिला भीती दाखवून(१८) आपले पूर्वजन्मींचे लुबाडलेले धन मागूं लागला. त्या भयभीत सतीली औदुंबराच्या मुळापाशी दुःख हरण करणाऱ्या श्रीगुरूंचे दर्शन झाले.१९.

**ब्राह्मणीं भीषयित्वा तां ययाचे द्रव्यमात्मनः । भीतोदुम्बरमूले सा ददर्श श्रीगुरुं हरिम् ।।१९।।**
**तां च तं तादृशं दृष्ट्वा पिशाचं प्राह सद्गुरुः । कस्त्वं पिशाचरूपेण सतीं खेदयसेऽधम ।।२०।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**यतीन्द्र त्वय्यनर्होऽयं पक्षपातोऽहमात्मनः । अनयाऽपहृतं द्रव्यं याचितुं हीदृशोऽभवम् ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**अनेन ते कथं मोक्षो बह्वमङ्गलयोनितः । येनाप्यते सद्गतिस्तच्छृणु तेन हितं भवेत् ।।२२।।**

ब्राह्मणीं भीषयित्वा तां आत्मनः द्रव्यं ययाचे। भीता सा उदुम्बर+मूले श्रीगुरुं हरिं ददर्श।१९। तां तादृशं, तं च दृष्ट्वा सद्गुरुः पिशाचं प्राह। (रे) अधम! सतीं पिशाचरूपेण खेदयसि, त्वं कः?२०। पिशाच उवाच। (हे) यतीन्द्र! अयं पक्षपातः त्वयि अनर्हः। अनया अपहृतं आत्मनः द्रव्यं याचितुं अहं ईदृशं अभवम् हि।२१। श्रीगुरुः उवाच। अनेन ते बहु+अमंगल+योनितः कथं मोक्षो? येन सद्गतिः आप्यते तत् शृणु। तेन हितं भवेत्।२२।

त्या भयाकूल ब्राह्मणीला आणि तिला भिवविणाऱ्या त्या पिशाचाला पाहून त्याला सद्गुरूंनी विचारले, 'अरे नीचा! त्या बिचाऱ्या सतीला कष्ट देणारा तूं कोण आहेस?'२०. तो समंध उत्तरला, 'अहो यतिराज, आपल्यासारख्या संन्याशाला हा पक्षपात शोभत नाही. ह्या स्त्रीने लुबाडलेले माझे धन मागतां मागतां मला ही अशी अमंगळ अवस्था प्राप्त झाली.' धनाच्या वासनेने आपल्याला या योनीत खेचून आणले असल्याने आपला कांही दोष नाही असा त्या पिशाचाचा दावा आहे.२१. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अशा भयंकर अपत्यहत्येने तिचा छळ करून तुझी ह्या अत्यंत अमंगळ कष्टप्रद योनीतून कशी सुटका होईल? तुला सद्गती लाभेल असा उपाय ऐक. त्याने तुझे कल्याण होईल. ह्या दुःखद योनीतून तुझी मुक्ती होईल.२२.

**योन्यन्तरे हृतार्थोऽस्ति किंत्वत्र फलभागिनी । प्राप्ता दरिद्रवंशेऽसौ लभ्यतेऽतः कुतो धनम् ।।२३।।**
**अतस्तया कारयित्वा शक्त्या कर्मौर्ध्वदेहिकम् । त्वद्गोत्राय यथालभ्यं दापयित्वा धनं खलु ।।२४।।**
**विप्राय प्रेत कस्मैचित्ततो मोक्षं ददामि ते । नेदं त्वां रोचते चेत्तां रक्षामि स्वेच्छयाचर ।।२५।।**

**।। पिशाच उवाच ।।**

**देवदेव कृतार्थोऽस्मि त्वत्पादाब्जविलोचनात् । ममाद्य निष्कृतिर्जाता यथेच्छसि तथा कुरु ।।२६।।**
**एवं तन्निश्चयं ज्ञात्वा ब्राह्मणीं प्राह सद्गुरुः । संवादो नौ श्रुतः साध्वि तथा निर्व्याजमाचर ।।२७।।**

हृतः अर्थः योनि+अन्तरे अस्ति। किंतु असौ अत्र फलभागिनी दरिद्रवंशे प्राप्ता। अतः धनं कुतो लभ्येत्?२३। (हे) प्रेत, अतः तया शक्त्या और्ध्वदेहिकं कर्म कारयित्वा त्वत्+गोत्राय कस्मैचित् विप्राय यथालभ्यं धनं दापयित्वा ते मोक्षं ददामि खलु। इदं त्वां न रोचते चेत् तां (अहं) रक्षामि। (त्वं) स्वेच्छया आचर।२५। पिशाच उवाच। '(हे) देवदेव! त्वत्+पाद+अब्ज+विलोचनात् (अहं) कृतार्थः अस्मि। अद्य मम निष्कृतिः जाता। यथा इच्छसि तथा कुरु।'२६। एवं तत्+निश्चयं ज्ञात्वा सद्गुरुः ब्राह्मणीं प्राह। (हे) साध्वि, नौ संवादः (त्वया) श्रुतः। तथा निर्व्याजं आचर।२७।

तिने तुझ्याकडून पूर्वजन्मी हिरावलेल्या शंभर रौप्यमुद्रा तर त्याच जन्मांत राहिल्या. आतां ह्या जन्मांत त्या अपहाराच्या पापाचे फळ ही भोगत असल्याने बिचारी दरिद्री कुळांत जन्मली आहे. मग तिला कुठून एवढे पैसे मिळणार?२३. अरे समंधा, एवढ्यासाठी ह्या ब्राह्मणीकडून यथाशक्ती तुझे अंत्यसंस्कार करवून आणि तुझ्या गोत्राच्या एखाद्या ब्राह्मणाला तिला शक्य असेल तेवढे पैसे देववून मी तुला या योनीतून नक्की मुक्त करीन.२४. तुला हे पटत नसेल तर तुला वाटेल ते तूं कर! मी ह्या सतीचे रक्षण करीन.२५. तो समंध म्हणाला, 'देवाधिदेवा दत्तात्रेया! आपल्या चरणकमलांच्या दर्शनाने मी कृतकृत्य झालो आहे. माझ्या पापकर्माची निष्कृती झाली आहे. आपण आपल्या इच्छेनुसार काय ते करावे.'२६. असा त्या पिशाचाचा निश्चय जाणून त्या ब्राह्मणस्त्रीला सद्गुरू म्हणाले, 'हे सती, तूं आमचा संवाद ऐकलास. त्याप्रमाणे ह्या ब्राह्मणाचे क्रियाकर्म निष्कपटपणे कर.'२७.

**तेनासौ सद्गतिं यायाद्वंशवृद्धिश्च ते भवेत् । उक्त्वैवं ध्यानगम्योऽभूद्धरिर्बुद्धाऽभवत्सती ।।२८।।**
**पत्ये शशंस तत्सर्वं तथैवाचीकरत्क्रियाम् । तया प्रेतो गतिं लेभे साप्यपापा बभूव ह ।।२९।।**
**अपरेऽहनि तत्स्वप्ने फले विन्यस्य चांशुके । तामाह भोजयित्वाऽजो विप्रान्भुङ्क्ष्व फलेत्विति ।।३०।।**
**प्रबुद्धापि फले दृष्ट्वा भोजयित्वा द्विजान् फले । कान्तेन साकं बुभुजे ततोऽभूद्गर्भिणी सती ।।३१।।**

तेन असौ सद्गतिं यायात्। ते वंश+वृद्धिः च भवेत्। एवं उक्त्वा हरिः ध्यान+गम्यः अभूत्। सती बुद्धा अभवत्।२८। तत् सर्वं पत्ये शशंस। तथा एव क्रियां आचीकरत्। तया प्रेतः गतिं लेभे। सा अपि अपापा बभूव ह।२९। अपरे अह्नि तत्+स्वप्ने अंशुके फले विन्यस्य च अजः तां आह, विप्रान् भोजयित्वा फले भुङ्क्ष्व।३०। (सा) प्रबुद्धा अपि फले दृष्ट्वा, द्विजान् भोजयित्वा कान्तेन साकं फले बुभुजे। ततः सती गर्भिणी अभूत्।३१।

त्या तूं केलेल्या क्रियाकर्माने ह्या पिशाचाला सद्गती लाभेल आणि त्याची पीडा जाऊन तुझा वंशही वाढेल.' असे बोलून भगवान् ध्यानगम्य - म्हणजे अदृश्य झाले आणि ती सती जागी झाली.२८. ते सर्व स्वप्न त्या स्त्रीने आपल्या पतीले निवेदन केले. त्याप्रमाणेच त्यांनी सर्व कर्म केले. त्यायोगे त्या पिशाचाचे प्रेतत्व परिहरून तो उत्तम लोकांला गेला. ती सतीही पापरहित झाली. वरील आख्यानाद्वारा कठोपनिषदांत (१:१:२०) नचिकेताने यमाला विचारलेल्या प्रश्नांत 'मृत्यूनंतर जीव असतो असे कुणी म्हणतात तर नसतो असे कांही म्हणतात' या दोन मतांतील, मृत्यूनंतर जीवाला अस्तित्व नसते असे मत खोडून काढले आहे. कठोपनिषदांतच पुढे (२:२:७) जीव आपापल्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार स्थावर किंवा जंगम योनीत जातात असे प्रतिपादन केले आहे.२९. दुसऱ्या दिवशी तिच्या पदरांत दोन नारळ घालून श्रीगुरूंनी तिला सांगितले की 'ब्राह्मणभोजन घालून ही फळे तुम्ही दोघे खा.'३०. जागी झाल्यावरही आपल्या पदरांत फळे पाहून तिने श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे ब्राह्मणांना जेवायला घालून ती फळे आपल्या पतीसह भक्षण केली. त्या फळप्रसादाच्या प्रभावाने ती ब्राह्मणी गर्भवती झाली.३१.

**काले दत्तप्रसादेन सूर्याचन्द्रमसाविव । पुत्रावसूत विप्रोऽपि जातकर्मादिकं व्यधात् ।।३२।।**
**ततोऽष्टमेऽब्दे ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा । सम्भाराः संभृताः पित्रा तदाद्भुतमिवाभवत् ।।३३।।**
**अकस्मात्सन्निपातेन ज्येष्ठपुत्रो ममार हि । उच्चै रुरोद तन्माता कोरस्ताडनपूर्वकम् ।।३४।।**

दत्तप्रसादेन काले (सा सती) सूर्या+चंद्रमसौ इव पुत्रौ असूत। विप्रः अपि जात+कर्मादिकं व्यधात्।३२। ततः ज्येष्ठस्य व्रतबन्धं चिकीर्षुणा पित्रा सम्भाराः सम्भृताः। तदा अद्भुतं इव अभवत्।३३। ज्येष्ठपुत्रः अकस्मात् सन्निपातेन ममार हि। तन्+माता उच्चैः क+उरस्+ताडन+पूर्वकं रुरोद।३४।

श्रीदत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने त्या सतीला सूर्य-चंद्रसदृश जुळे मुलगे झाले. तिच्या पतीने शास्त्राप्रमाणे जन्माच्या संबंधीची कर्मे केली.३२. पुढे ज्येष्ठ (जुळ्यांतील नंतर जन्मलेल्या) पुत्राच्या मौंजीबंधनासाठी वडिलांनी सर्व सामुग्री जमवून तयारी केली असतां त्या वेळी एक नवलच घडले.३३. तो थोरला भाऊ अचानक सन्निपाताने मरण पावला. सन्निपात म्हणजे तीनही दोषांचा एकदम प्रकोप होणे. त्यामुळे अभिन्यास नांवाचा अत्यंत गंभीर असा ज्वर होतो. श्रीस्वामि महाराजांनी इथे माधवनिदानांतील ज्वरनिदानांतील श्लोक उद्धृत केले आहेत. शरीराचे तापमान खूप वाढून, सर्व ज्ञानेंद्रियांची (घ्राण, नेत्र, कान इत्यादि) शक्ती क्षीण होते. रोगी एकाच जागेवर निश्चल पडून राहतो. उशीवर डोके बडवून घेतो. सारखा कुशी बदलतो. कधी तरी थोडेसेच बोलतो. इत्यादि लक्षणे सांगितली आहेत. चरकसंहितेत याला अभिषंगज्वर असे म्हटले आहे. तो काम, शोक, भय, क्रोधांनी अभिभूत झालेल्या व्यक्तीला होतो. भूत-पिशाचांच्या अभिषंगानेही तो होतो असे तिथे म्हटले आहे. अशा भयानक विकाराने ग्रस्त झालेला त्या मुलाची वाणी छांदोग्योपनिषदांत (६:८:६) सांगितलेल्या क्रमाने मनांत विलीन झाली, मन प्राणांत, प्राण तेजांत, तेज परदेवतेत विलीन झाले. अंती तो बिचारा मुलगा हात-पाय वेडेवाकडे करीत, मर्मस्थानांच्या नाशाने प्राणांचे उत्क्रमण होऊन सर्व इंद्रियांच्या लयाद्वारे मरण पावला. त्याची माता मस्तक आणि ऊर पिटीत जोरजोराने रडूं लागली.३४.

**।। ब्राह्मण्युवाच ।।**

**हा पुत्र क्व गतोसि त्वं पयो मे स्रवते वृथा । कति शेषेऽचिरं वत्स बुद्ध्यस्वेदं पयः पिब ।।३५।।**
**भोजनावसरोऽयं ते भुक्त्वा रन्तुं चराङ्गणे । वयस्या आह्वयन्ति त्वामुत्तिष्ठोत्तिष्ठ मा स्वप ।।३६।।**
**त्वं नोत्तिष्ठसि चेत्प्राणांस्त्यक्ष्याम्यग्रे तवाधुना । जाता ये पञ्चपुत्रा मे तेषां त्वं प्राणवन्मम ।।३७।।**

ब्राह्मणी उवाच। 'हा पुत्र! क्व गतः असि? मय पयः वृथा स्रवते। कति शेषे? (हे) वत्स! अचिरं बुद्ध्यस्व। पयः पिब।'३५। 'अयं ते भोजन+अवसरः। वयस्याः त्वां रन्तुं आह्वयन्ति। भुक्त्वा अङ्गणे चर। उत्तिष्ठ, उत्तिष्ठ, मा स्वप।३६। अधुना त्वं न उत्तिष्ठसि चेत् तव अग्रे प्राणान् त्यक्ष्यामि। ये मे पंच पुत्रा जाता तेषां त्वं मम प्राणवत्।३७।

ती माता रडतां रडतां पुत्राला उद्देशून बोलूं लागली. 'अरे बाळा, कुठे रे गेलास तू? हे पाहा माझे दूध व्यर्थ वाहून जाते आहे. किती झोपतोस? माझ्या राजा, राजा रे, राजुड्या, लवकर ऊठ, हे वायां जाणारे दूध पी!' 'अरे तुझी जेवायची वेळ झाली आहे. हे तुझे सवंगडी बघ तुला खेळायला बोलावीत आहेत. जेवून त्यांच्याबरोबर अंगणांत खेळायला जा. ऊठ! ऊठ! असा झोपू नकोस!३६. आता जर तू उठला नाहीस तर मी तुझ्यापुढेच जीव देईन. मला जे पाच पुत्र झाले त्यांत तूं माझा जीव की प्राण आहेस.३७. तूं मेलास तर मीही मरून जाईन, कारण तूच माझा प्राण आहेस! बाळा, अगदी गर्भधारणेपासून आजपर्यंत मला तू कांहीसुद्धा त्रास दिला नाहीस. ३८.

**मृते त्वयि मरिष्ये मे यतः प्राणोऽसि केवलम् । रे दोहदप्रभृत्यद्य यावद्दुःखं न दापितम् ।।३८।।**
**गर्भे नष्टास्त्रयोऽर्भास्तद्दुःखं त्वन्मुखवीक्षणात । मया विस्मृतमद्याक-सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि ।।३९।।**
**धर्मोऽयं ते न वार्धक्ये त्राता नौ पुत्र को वद । एवं तद्रुदितं श्रुत्वा तत्रत्या ऊचुरेत्य ताम् ।।४०।।**
**किं शोचसि वृथा भीरु मृत्युर्देवर्षिदानवान् । न विस्मरति कालेऽपि मनुष्याणां तु का कथा ।।४१।।**
**अवतारा येऽवतीर्णास्तेऽपि कालवशं गताः । एवं सति वृथा शोकं त्वं मा कुरु विचारय ।।४२।।**

त्वयि मृते मरिष्ये, यतः केवलं प्राणः असि। रे! दोहद+प्रभृति अद्य यावत् दुःखं न दापितम्।३८। त्रयः अर्भः गर्भे नष्टाः तत् दुःखं त्वन्+मुख+वीक्षणात् मया विस्मृतम्। अद्य अक+सिन्धौ त्यक्त्वा क्व यास्यसि?'३९। अयं ते न धर्मः। (हे) पुत्र! वार्धक्ये नौ कः त्राता वद। एवं तत्+रुदितं श्रुत्वा तत्रत्या एत्य तां ऊचुः।४०। '(हे) भीरु, वृथा किं शोचसि? मृत्युः काले देव+ऋषि+दानवान् न विस्मरति। मनुष्याणां तु का कथा?४१। ये अवताराः अवतीर्णाः ते अपि कालवशं गताः। एवं वृथा शोकं मा कुरु। विचारय।'४२।

माझी तीन बाळे गर्भांतच नाश पावली. ते दुःख मी तुझ्याकडे पाहून विसरले. आतां मला दुःखाच्या सागरांत बुडवून कुठे निघालास?३९. आमचा असा त्याग करणे हा तुझा धर्म नाही. आम्हां मायबापांना म्हातारपणी कोण दुसरा सांभाळणारा आहे, सांग बरे! इहलोकांत किंवा परलोकांत पुत्राशिवाय कुणीच त्राता नाही याविषयी श्रीस्वामिमहाराजांनी ऐतरेय ब्राह्मणांतील मंत्राचा (पराकाशांत पुत्रच ज्योतिःस्वरूप आहे. पितर पुत्रामुळेच गाढ अंधःकाराला ओलांडून जातात..' ७:३:१) दाखला दिला आहे.४०. 'भयशीले (स्त्रिये), व्यर्थ कां शोक करतेस? काळ आला की मृत्यू देव, ऋषी वा दैत्य यांनासुद्धां विसकरत नाही (सोडत नाही), मग मनुष्यांची ती काय गोष्ट?४१. रामकृष्णादिक अवतारांचाही यथाकाल नाश झालाच ना? असा व्यर्थ शोक न करता तू नश्वर देह आणि चिरंतन आत्मा यांचा विचार कर.'४२.

**।। सोवाच ।।**

**अहो बत पिशाचोत्थं दूरीकृत्य भयं हि मे । येन देवेन यद्दत्तं फलं तद्विफलं कथम् ।।४३।।**
**यदि तस्य मृषा वाक्यं तं भजन्ति कुतोऽपरे । बिभीषणध्रुवमुखैर्मन्तव्यं तदृतं कथम् ।।४४।।**
**लोकान्तरे नयाम्येतां तत्कीर्तिं सूनुना सह । एवं रुदित्वा संस्कर्तुं न ददौ शवमङ्गना ।।४५।।**
**ग्रामे तु भोजनाभावाल्लोकास्त्रस्तास्तदैत्य हि । यदृच्छयाऽब्रवीद्वाग्मी जटिलस्तापसः सतीम् ।।४६।।**

सा उवाच। 'अहो बत पिशाच+उत्थं भयं दूरीकृत्य येन देवेन यत् फलं दत्तं तत् कथं विफलं (जातम्)?४३। यदि तस्य वाक्यं मृषा तं अपरे कुतो भजन्ति? बिभीषण+ध्रुव+मुखैः तत् कथं ऋतं मन्तव्यम्?४४। एतां तत्+कीर्तिं सूनुना सह लोकान्तरे नयामि।' अवं रुदित्वा अङ्गना शवं संस्कर्तुं न ददौ।४५। ग्रामे तु भोजनाभावात् लोकाः त्रस्ताः। तदा हि जटिलः तापसः वाग्मी यदृच्छया एत्य सतीं अब्रवीत्।४६।

ती माता म्हणाली, 'अहो काय सांगूं, पिशाचबाधेचा परिहार करून ज्या देवाने हे फळ दिले ते कसे नाश पावले?४३. जर त्या भगवंताचेच वचन मिथ्या झाले तर इतर लोक कसे त्याला भजतील? बिभीषण, ध्रुव इत्यादि भक्तांनी तरी ते कसे खरे मानावे?४४. ही त्याची कीर्ती ह्या माझ्या बाळासह स्वर्गादि लोकांत घेऊन जाते.' अशा प्रकारे विलाप करीत ती स्त्री आपल्या पुत्राचे शव अंत्यसंस्कारांसाठी देईना.४५. प्रेतसंस्काराशिवाय गांवात कुणालाही जेवतां आले नाही आणि सगळे लोक त्रासून गेले. त्या वेळी एक वाक्पटु जटाधरी तापसी अचानक तिथे आला आणि त्या सतीला उद्देशून बोलूं लागला.४६.

**।। तापस उवाच ।।**

**किं शोचसि मुधा साध्वि शोकस्याविषयं सुतम् । सुतस्तवैष देहो वा जीवो वा ब्रूहि सारतः ।।४७।।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयो देहोऽयं पुरतस्तव । जीवोऽजः सर्वगोऽनन्तः कोत्र शुग्विषयो वद ।।४८।।**

तापस उवाच। '(हे) साध्वि), किं मुधा शोचसि? सुतं शोकस्य अविषयम्। तव सुतः देहो वा जीवो वा सारतः ब्रूहि।४७। अयं त्वग्+रक्त+मांस+अस्थिमयः देहः तव पुरतः। जीवः अजः सर्वगः अनन्तः। अत्र कः शुग्+विषयः? वद!४८।

तो तापसी म्हणाला, 'हे सती, का उगीच विलाप करते आहेस? हा मुलगा शोकाचे कारण होऊच शकत नाही. मला सांग, तुझा मुलगा हा तुझ्यासमोरचा देह आहे कां त्याला सोडून गेलेला जीव आहे? अगदी विचार करून बघ!४७. हा त्वचा, रक्त, मांस, अस्थी यांचा अन्नमय, प्राणमय आदि सहा कोशांचा बनलेला देह तुझ्यापुढेच आहे. तो तुझ्याजवळच असल्याने त्याचा शोक करण्याचे कांहीच कारण नाही. सहा कोशांच्या पुरचुंडीहून वेगळा असा जीव ज्याच्यामुळे ही जड (अचेतन) पुरचुंडी सचेतनासारखी भासते तो तुझा मुलगा असे म्हणशील तो परमेश्वराचा अंश आहे, जन्ममरणादि विकारशून्य आहे. सर्वव्यापी आहे. तो आत्मा असल्याने ब्रह्मरूपच आहे. आत्म्याच्या दोन अवस्था आहेत. १. व्यवहारविशिष्ट २. केवल. व्यवहारही स्वप्न, जागृती आणि सुषुप्ती असा तीन प्रकारांचा आहे, कैवल्योपनिषदानुसार (१:१३).

१. **सुषुप्ती**त (गाढ निद्रा) तमोगुणाच्या प्रभावाने सर्व उपाधींचा विलय होऊन परमानंदरूप ब्रह्मच होतो. (*'आप्नोति इति आत्मा.'*)

**कालकर्मगुणोत्पन्नं जगन्मायामयं त्विदम् । कथं ध्रुवं हि मन्तव्यं यथा कर्मैन्द्रजालिकम् ।।४९।।**
**कालकर्मगुणाद्युत्थ-देहिनः स्वत्वकल्पना । पुत्रादिरूपा मिथ्यैषा नद्यां काष्ठौघवच्चला ।।५०।।**

इदं मायामयं जगत् तु काल+कर्म+गुण+उत्पन्नं यथा ऐन्द्रजालिकं कर्म, कथं हि ध्रुवं मन्तव्यम्?४९। एषा काल+कर्म+गुण+आदि+उत्थ+देहिनः पुत्र+आदि+रूपा स्वत्व+कल्पना मिथ्या, नद्यां काष्ठ+ओघवत् चला।'५०।

२. वाचा, हात, पाय इत्यादि इंद्रियांचा उपशम झाल्यावर येणाऱ्या **स्वप्न** या अवस्थेत तीत गिरी, नदी, समुद्र, मनुष्य, पशु इत्यादि सर्व लौकिक पदार्थांचा वासनारूप अंश घेऊन, जागृतावस्थेतील अभिमानाचा स्वतःच नाश करून, एक जगतच आपल्या अंतःकरणाने निर्माण करून, आपल्या चैतन्याने त्या कल्पित पदार्थांना रूप देऊन, जागृत अवस्थेतील वासना त्यांत आणणारा तो आत्मा (*'आदत्ते इति आत्मा'*). बृहदारण्यक उपनिषदांत (४:३:९) याचे असे वर्णन केले आहे. स्वप्नावस्थेत जीवात्मा ह्या भौतिक जगांतल्याच सर्व पदार्थांचे अंश घेऊन, आपणच त्या सर्व विस्कटून स्वतःच पुन्हां उभ्या करतो; आणि स्वतःच्याच तेजाने स्वतःच्याच प्रकाशांत स्वप्न पाहतो.

३. **जागृत** अवस्थेत नेत्रादि इंद्रियांच्या माध्यमांतून बाह्य विषयांचा भोग घेतो (*'अत्ति इति आत्मा'*) ही उपाधिविशिष्ट आत्म्याची तिसरी अवस्था आहे. कैवल्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणे तो स्त्री, अन्न, पान इत्यादि विचित्र भोगांनी परितृप्त होतो.'

उपाधिरहित **केवल आत्मा** सतत जाणारा तो आत्मा (*'अतति इति आत्मा'*). हाच ऐतरेय आरण्यांत *'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म'* असा वर्णिलेला आहे. अनंत म्हणजेच देश-काल-वस्तू ह्या परिच्छेदांनी रहित. जीव आणि अनंत ह्या दोन्हींचे एकत्व दर्शवून अजन्मा, सर्वगामी या आधीच्या विशेषणांची पुष्टीच होते. अशा रीतीने देह आणि जीव यांच्यात शोक कुणाचा करतेस ते सांग या प्रश्नांतच नकारार्थी उत्तर अभिप्रेत आहे.४८. श्रीगुरू पुढे सांगत आहेत. हे दृश्य जग त्रिगुणात्मक मायेपासून झालेले आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांना क्षोभवणारा काल आहे. आणि जीवांच्या उत्पत्तीला कारण त्यांचे कर्म असते. असे हे गारुड्याच्या इंद्रजालासारखे जग शाश्वत कसे मानतां येईल?४९. काल, कर्म, गुण यांच्यापासून उद्भवलेल्या ह्या जीवाविषयी जी 'हा माझा मुलगा' अशी आत्मीयता तुला वाटते ती मिथ्या आहे. फसवी आहे. नदीत वाहणाऱ्या लाकडांच्या समूहासारखी अस्थिर आहे.५०.

**त्वया ध्रुवा मतेयं चेद्वद पूर्वापरोद्भवे । कस्य त्वं जननी स्त्रीर्वा के वा सम्बन्धिनस्तव ।।५१।।**
**जन्ममृत्यू कालवशादलङ्घ्यौ दिनरात्रिवत् । शरीरिणोऽङ्गे बाल्यादि यथा देहान्तरं तथा ।।५२।।**
**गुरुप्रसादाद्यततो भ्रमोऽयं लीयतेऽचिरात् । तेनर्ते मृत्यवे कल्प्यो जातो वै जनुषे मृतः ।।५३।।**

इयं त्वया ध्रुवा मता चेत् वद पूर्व+अपर+उद्भवे त्वं कस्य जननी? स्त्रीः वा? के वा ते सम्बन्धिनः?५१। जन्म+मृत्यू कालवशात् दिन+रात्रिवत् अलंघ्यौ। शरीरिणः अङ्गे यथा बाल्यादि तथा देहांतम्।५२। गुरुप्रसादात् यततः अयं भ्रमः अचिरात् लीयते। तेन ऋते जातः वै मृत्यवे कल्प्यः मृतः जनुषे।५३।

तरीही तुला वाटणारी आपुलकी खरी आणि कायमची मानलीस तर मग सांग बरं तू पूर्वीच्या किंवा पुढच्या जन्मी कुणाची आई वा स्त्री होतीस आणि होणार आहेस? कोण कोण तुझे नात्यांतले होते आणि होतील?५१. 'जीवासाठी मी शोक करीत नाही, त्याच्या जन्म-मृत्यूमुळे होणाऱ्या दुःखाने शोक होतो' असे तू म्हणशील तर जसा दिवस संपला की रात्र येते आणि रात्रीनंतर पुन्हा दिवस, तसेच जन्म आणि मृत्यू कालाधीन आहेत. ते टाळतां येत नाहीत. देहाभिमानी जीवाला त्याच्या शरीराच्या बाल्यादि अवस्था नेमलेल्याच असतात (*'देहिनेऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यते।।'* भ.गीता २:१३). 'जो अल्पवयस्क आणि अशक्त असा बालक मी होतो तोच मी प्रौढ आणि बलवान झालो आहे', ही जशी जाणीव असतेच; किंवा नवजात बालकाची पूर्वजन्मीची सर्व स्मृती नष्ट झालेली असूनही स्तन चोखण्याची प्रवृत्ती मात्र असते. तरीही जीवाविषयीची आपुलकी हा अविवेकी लोकांना वाटणारा भ्रमच आहे.५२. सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने जो प्रयत्नशील राहतो त्याचा भ्रम मात्र लवकरच विरून जातो. यततः म्हणजे शेवटच्या श्वासापर्यंत यत्नशील. ब्रह्मसूत्रांतील प्रतिपादनानुसार (४:१:१२) उपासना मृत्यूच्या क्षणापर्यंत चालूं राहिली पाहिजे. मात्र गुरुकृपेशिवाय जन्मला आलेला मृत्यू पावणार आणि मेलेला पुन्हां जन्माला येणार हे अटळ आहे (*'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च। तस्मादपरिहार्येर्थे न त्वं शोचितुमर्हसि।।'* भ.गीता २:२७). 'ह्या जन्मी नाही भ्रम गेला तर नसूं दे; पुढच्या जन्मी जाईल! पुढचा जन्म येणारच आहे की.'

**नार्यतोऽपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि । मृतः शुचा पुनर्नैति नाप्युपायान्तरायुतैः ।।५४।।**

**।। सोवाच ।।**

**न वेदान्तार्थतत्त्वादि रोचते येन मेऽर्पितम् । सुफलं तत्कुतो यातं विश्वस्तव्यः स कैर्भुवि ।।५५।।**

अतो (हे) नारि, त्वं अपरिहार्येर्थे शोचितुं न अर्हसि। मृतः शुचा, उपाय+अंतर+अयुतैः वा पुनः न एति। ५४। सा उवाच। वेदान्त+तत्त्व+अर्थ (मे) न रोचते। येन मे सुफलं अर्पितं तत् कुतः यातम्? सः भुवि कैः विश्वस्तव्यः?५५।

असे कुणी म्हणेल तर ते खरे नाही. आपण केलेल्या कर्माच्या प्रचंड पसाऱ्यांत भोग्य कर्मे किती तरी असतात. त्यांचा भोग भोगण्यासाठी कोट्यवधी अधोयोनि आणि देवादिक ऊर्ध्वयोनीत जीव फिरत असतो. त्या असंख्य फेऱ्यांत क्वचितच मनुष्यदेह लाभतो. असा मनुष्यदेह लाभला तरी त्यांत सगळी इंद्रिये पटु असणे हे विपुल पुण्याची जोड असेल तरच शक्य आहे. गरुडपुराणानुसार (धर्मकांड-प्रेतकल्प १:५) सर्व इंद्रियांनी संपन्न असा देह बहु पुण्यानेच लाभतो. पंगु, अंध इत्यादि देहांत किंवा कोळी, भिल्ल, यवन, म्लेच्छ, इत्यादि वंशांत जन्म आला तर परमार्थाचा गंधही लाभणार नाही. अगदी अधिकारी ब्राह्मण देहही मिळाला तरी मातेच्या कुशीत मल-मूत्र-वात-पित्त-कफादींनी बरबटलेल्या, रेत आणि रक्ताच्या संयोगाने झालेल्या, अशुचि बीजापासून वाढलेल्या, वारेत गुंडाळलेल्या गर्भाची वाढ आईच्या खाण्यापिण्यांत आलेल्या रसांनीच होते. त्याची शक्ती, बल, प्रज्ञा, तेज, हालचाल सर्व कुंठित असतात. मुहूर्तमात्र सहन करायला अशक्य अशा ह्या अवस्थेत दहा महिने अगतिक अवस्थेत पडून राहून योनीद्वारा कष्टप्रद रीतने बाहेर पडायचे. म्हणून पुत्राच्या मृत्यूचा शोक टाकून ज्ञानासाठी यत्नशील असावे हा भावार्थ.५३. म्हणून बाई ग, तूं ह्या पुत्रमृत्यूसारख्या अटळ गोष्टीचा शोक करणे उचित नाही. मेलेला शोकाने, विलापाने किंवा इतर हजारो उपायांनीही परत येत नाही.५४. ब्राह्मणी म्हणाली, हा सगळा वेदांत आणि तत्त्वज्ञान माझ्या गळी उतरत नाही. ज्या दत्तगुरूंनी मला हे सुफल दिलं ते असं कसं गेलं? आतां त्यांच्यावर कोण विश्वास ठेवील?५५.

**।। साधुरुवाच ।।**

**यत्र त्वया वरो लब्धस्तत्र गत्वा सविस्तरम् । वरदं परिपृच्छेदं यास्येऽलं विस्तरेण भोः ।।५६।।**
**तच्छ्रुत्वा शवमादाय सद्गुरोराश्रमं ययौ । तत्र पादुकयोः शीर्षं ताडयामास भामिनी ।।५७।।**

साधुः उवाच। भोः, यत्र त्वया वरः लब्धः तत्र गत्वा वरदं इदं सविस्तरं परिपृच्छ्। विस्तरेण अलम्।५६। तत् श्रुत्वा शवं आदाय सद्गुरोः आश्रमं ययौ। तत्र भामिनी पादुकयोः शीर्षं ताडयामास।५७।

तेव्हां तो साधू म्हणाला, जिथे तुला पुत्रप्राप्तीचा वर मिळाला तिथे जाऊन वर देणाऱ्या हरीलाच तूं हे सर्व विचार. मी आतां अधिक कांही न बोलतां जातो.५६. ते त्या साधूचे बोलणे ऐकून ती सती आपल्या पुत्राचे ते शव घेऊन सद्गुरूंच्या मंदिराला गेली. शोक आणि संतापाने तापलेल्या त्या स्त्रीने तिथे पादुकांवर डोके आपटून घेतले.५७. अशा प्रकारे तिने संध्याकाळपासून रात्रीपर्यंत शोक केला आणि अंत्यसंस्कारासाठी ते प्रेत दिले नाही. त्यामुळे वाट पाहून ब्राह्मण घरी गेले. ते दोघे पती-पत्नी मात्र तिथेच राहिले.५८.

**प्राण -** थोड्या वेळाने रात्री तिला झोप लागली. स्वप्नांत तिला श्रीगुरूंचे दर्शन झाले. ते तिला म्हणाले, 'बाई, मी काय तुझे काय अहित केले आहे?' 'तो' (**सः**) असा वेदांनी अपरोक्षत्वाने निर्देशिलेला वायू म्हणजेच बृहदारण्यक उपनिषदानुसार (३;७:२) सर्वज्ञत्वादि स्वरूपलक्षणयुक्त अंतर्यामी, सर्व जीव आणि जग यांच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचे कारण असणारा ईश्वर होय. 'हा' (**एष**) शब्दाने अपरोक्ष, स्वयंप्रकाश प्रत्यगात्मा (जीवात्मा) म्हणजेच प्राण. प्राण हा शब्द अन ह्या चलनार्थी धातूपासून झालेला आहे. तो कसा आत्मा होईल? या आक्षेपाला छांदोग्य उपनिषदाच्या सातव्या अध्यायांत सनत्कुमारांनी नारदाला केलेल्या उपदेशाचा आधार घेतला आहे. नामापासून सुरुवात करून क्रमाक्रमाने वाग्, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप, तेज, आकाश, स्मृती आणि आशा

**एवं निशीथादासायं शुशोच न ददौ शवम् । संस्कर्तुं स्वालयं विप्रा जग्मुस्तत्रैव दम्पती ।।५८।।**
**ततो निशीथे सुष्वाप साध्वी स्वप्ने ददर्श सा । श्रीगुरुं प्राह सोऽप्येनां किं मयापकृतं हि ते ।।५९।।**

एवं आसायं निशीथात् शुशोच। शवं संस्कर्तुं न ददौ। विप्राः स्व+आलयं जग्मुः। दम्पती तत्र एव तस्थुः।५८। ततः निशीथे साध्वी सुष्वाप। सा स्वप्ने श्रीगुरुं ददर्श। सः अपि एनां प्राह, मया ते किं अपकृतं हि।५९।

हे उत्तरोत्तर कार्यकारणभावाने तसेच निमित्तनैमित्तिकभावाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत असे सांगून अंती आशेपेक्षांही प्राण श्रेष्ठ आहे असे सोदाहरण प्रतिपादन केले आहे. सर्व क्रिया, कारक, फल, भेद हे प्राणच आहेत हे सांगतांना, प्राणच प्राणाने चालतो, प्राणच प्राण देतो, प्राणच प्राणाला देतो; पिता प्राण, माता प्राण, भ्राता प्राण, बहीण प्राण, प्राणच आचार्य, प्राणाच्या व्यतिरिक्त कांहीच नाही असे स्पष्ट करण्यासाठी तिथे पुढे म्हटले आहे की 'आई, वडील, भाऊ, बहीण, गुरु इत्यादींचे प्राण असतील तर त्यांना दुरुत्तरे करणाऱ्याचा लोक पितृघाती, मातृघाती, गुरुघाता इत्यादि विशेषणांनी धिक्कार करतात. परंतु त्याच मातापितरादींना प्राण सोडून गेल्यावर त्यांना जाळून टाकणाऱ्याला मात्र मातृघातकी, पितृघातकी असे धिक्कार ऐकावे लागत नाहीत.' अशा रीतीने, 'प्राणच हे सर्व कांही आहे,' हे पाहणारा, विचार करणारा, समजून घेणारा अतिवादी - सर्वश्रेष्ठ तत्त्व जाणणारा होतो.

इथे कुणी असा आक्षेप घेईल की शंकराचार्यांनी शतश्लोकींत (२८) प्रतिपादल्याप्रमाणे जन्माच्या वेळी आत्मा येत नाही किंवा मृत्यूच्या वेळी जात नाही, तो अखण्ड असतो; (*'नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यन्तकाले यत्सोऽखण्डोऽस्ति लैङ्गं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक्। तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किन्तु*

**प्राणो नामैष वायुः स बहिर्यातो मुहुर्मया । आनीय पूर्ववन्न्यस्तस्त्यजातः शुचमङ्गने ।।६0।।**

एष प्राणः नाम वायुः सः बहिः यातः। स मया मुहुः आनीय पूर्ववत् न्यस्तः। अतः, हे अङ्गने, शुचं त्यज।६0।

*संस्कारजातैः तेजोमात्री गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैस्सहैव।।२८।।'*) येणे-जाणे इत्यादि लिङ्गदेहापुरते असते. तर मग प्रत्यगात्मा आला किंवा गेला असे कसे म्हणतां येईल? प्रश्नोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार रथचक्राच्या अरा जशा नाभीशी जुडलेल्या असतात तसेच ह्या इंद्रिये, मन आदी यांचा संघात असलेल्या देहांत प्रज्ञात्मा प्रवेश करून त्या सर्वांच्या नामरूपांची अभिव्यक्ती करतो. हा अनुप्रवेश आरशांत होणाऱ्या बिंबाच्या प्रवेशासारखा असतो. ते प्रतिबिंब आणि बिंब जसे एकरूप असतात तसेच जीव आणि आत्मा जाणावेत. हा जीवाविना सर्व मृत होतात; पण जीव कधीच मरत नाही (छां.उ. ६:११:३). ज्या जीवाच्या वियोगाने मृत्यू होतो त्यालाच तो जीव म्हणजे प्राण बाहेर गेला असे श्रीगुरू म्हणतात. 'तो गेलेला प्राण मी आणून पूर्ववत् जागच्या जागी ठेवला आहे. आतां तो मृत नाही. तेव्हां आतां तूं शोक सोड.' असे श्रीगुरू त्या सतीला म्हणाले. इथे गेलेले प्राण परत आणण्याविषयी सुबंधूचे प्राण त्याच्या भावांनी परत आणले तो दृष्टांत दिलेला आहे (शतश्लोकी २९). वाचा नसली तरी तो मुका म्हणून जिवंतच असतो. डोळे नसतील तर तो आंधळा झाला तरी जिवंतच असतो. कान गेलेला बहिरा जिवंतच असतो. इतकेच काय मन नसले तरी वेडा जिवंतच असतो. पण जीवा(प्राणा)शिवाय कुणी जिवंत असूं शकत नाही ह्या कौषीतकी उपनिषदाचे (३:३) वचन इथे उद्धृत केले आहे.६0.

**इति दृष्ट्वा विनिद्राऽभूद् ददर्शोत्थितमात्मजम् । हर्षशोकान्विता साध्वी प्रेम्णा भर्तारमाह्वयत् ।।६१।।**
**सोऽप्युत्थायात्मजं दृष्ट्वा रुदन्तं क्षुत्तृडाकुलम् । मन्त्रवत् त्रिरवघ्राय मूर्ध्न्यस्तौषीत्परात्परम् ।।६२।।**
**अत्रान्तरे प्रातरभूद् दग्धुं प्रापुः शवं द्विजाः । ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा सर्वं श्रुत्वाऽस्तुवन्हरिम् ।।६३।।**
**दम्पती तु ततः स्नात्वा प्रपूज्येशं सुविस्तरात् । नीराज्याभ्यर्च्य भूदेवान्जग्मतुर्निजमन्दिरम् ।।६४।।**
**विद्याविनयसंपन्नश्चिरजीवी स भाग्यभाक् । बभूवाप्येवमेवान्य आसन्पूर्णमनोरथाः ।।६५।।**

इति (स्वप्नं) दृष्ट्वा (सा) विनिद्रा अभूत्। उत्थितं आत्मजं ददर्श। हर्ष+शोक+अन्विता साध्वी प्रेम्णा भर्तारं आह्वयत्।६१। सः अपि उत्थाय रुदन्तं क्षुत्+तृड्+आकुलं आत्मजं दृष्ट्वा मूर्ध्निः मन्त्रवत् त्रिः अवघ्राय परात्परं अस्तौषीत्।६२। अत्र अंतरे प्रातः अभूत्। द्विजाः शवं दग्धुं प्रापुः। ते जीवन्तं सुतं दृष्ट्वा, सर्वं श्रुत्वा हरिं अस्तुवन्।६३। ततः दम्पती तु स्नात्वा ईशं सुविस्तरात् प्रपूज्य नीराज्य भूदेवान् अभ्यर्च्य निजमन्दिरं जग्मुः।६४। सः विद्या+विनय+संपन्नः चिरजीवी भाग्यभाक् बभूव। अन्ये अपि एवं एव पूर्णमनोरथाः आसन्।६५।

असे सर्व स्वप्नांत पाहून ती साध्वी जागी होऊन पाहते तर तिचा मुलगा उठून बसला होता. ते पाहून तिच्या मनांतल्या शोकाची जागा आनंदाने घेतली. ओठांवर हसू आणि डोळ्यांत पाणी अशी कांहीशी तिची अवस्था झाली. तिने प्रेमाने आपल्या हांक मारली.६१. तिच्या पतीनेही उठून आपल्या भुकेने आणि तहानेने व्याकुळ होऊन रडणाऱ्या मुलाला पाहून जवळ घेतले आणि त्याच्या डोक्याचे मंत्राने अवघ्राण केले आणि परमेश्वराची स्तुती केली.६२. थोड्या वेळाने सकाळ झाली आणि गांवातील ब्राह्मणवर्ग मुलाचे शव दहन करण्यासाठी आले. तेव्हां मलगा जिवंत झालेला पाहून आणि सर्व वृत्तांत ऐकून त्यांनीही भगवंताची स्तुती आरंभिली.६३. त्यानंतर त्या जोडप्याने श्रीगुरूंच्या पादुकांची सविस्तर पूजा करून आरती केली, ब्राह्मणांची पूजा करून आणि त्यांना भोजन घातले. नंतर सर्वजण आपापल्या घरी परतले.६४. तो पुनरुज्जीवित पुत्र विद्या आणि विनयांनी संपन्न, दीर्घजीवी आणि भाग्यवंत झाला. दुसरेही अनेक भक्त याचप्रमाणे श्रीगुरूंच्या कृपेने आपल्या कामना पूर्ण करून घेऊन सुखी झाले.६५.

**तत्राऽश्रान्तं स जागर्ति श्रीनृसिंहसरस्वती । अद्य कालान्तरेऽप्येवं न निद्रात्यन्यवत्कलौ ।।६६।।**
**तत्रेशमाद्यं दृढभक्तियुक्ता भजन्ति ये केऽपि सदुक्तिसक्ताः**
**ते प्राप्नुवन्ति द्रुतमिष्टकामान्निदर्शनं त्वत्र सती सुकामा ।।१।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे प्रेतसंजीवनं नाम द्वादशोऽध्यायः ।।१२।।**

तत्र सः श्रीनृसिंहसरस्वती कालान्तरे अद्य अपि अश्रान्तं जागर्ति। कलौ अन्यवत् न निद्राति।६६। तत्र आद्यं ईशं ये के अपि सत्+उक्ति+सक्ताः दृढ+भक्ति+युक्ताः भजन्ति ते द्रुतं इष्ट+कामान् प्राप्नुवन्ति। अत्र निदर्शनं तु सुकामा सती।१।

त्या कृष्णातीरावर औदुंबराच्या छायी तो भक्तकामकल्पद्रुम श्रीनृसिंहसरस्वती श्रीगुरू, शेकडो वर्षांचा काळ लोटूनही आजही अविश्रांत जागतो आहे. कलियुगांतही अन्य देवतांप्रमाणे तो झोप घेत नाही.६६. (क्षेपक) जे कुणी संतांच्या वचनावर विश्वास ठेवून त्या पादुकांची दृढ भक्तीने उपासना करतात त्यांच्या ईप्सित कामना शीघ्रच पूर्ण होतात. इष्टार्थ पावलेली ती शिरोळची सती हे त्याचे एक उदाहरण आहे.१.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा बारावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# त्रयोदशोऽध्यायः

**।। नामधारक उवाच ।।**

**आसाद्य भगवान्भीमां ततः किमकरोत्प्रभुः । श्रद्दधानाय मे शंस दुर्ग्रहं तस्य चेष्टितम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**गान्धर्वनगरे भीमामरजा संगमे शुभे । कृष्णापञ्चनदीयोग-तुल्ये तस्थौ जगत्प्रभुः ।।२।।**

**स्थित्वात्र गुप्तभावेन तत्रत्यब्राह्मणालयम् । गत्वा भिक्षां ययाचेऽसौ भक्तोद्धरणहेतवे ।।३।।**

नामधारक उवाच। भगवान् भीमां आसाद्य ततः प्रभुः किं अकरोत्? दुर्ग्रहं (अपि) तस्य चेष्टितं श्रद्दधानाय मे शंस।१। सिद्ध उवाच। कृष्णा+पंचनदी+योग+तुल्ये शुभे भीमा+अमरजा सङ्गमे गान्धर्वनगरे जगत्+प्रभुः तस्थौ।२। अत्र गुप्तभावाने स्थित्वा तत्रत्य+ब्राह्मण+आलयं गत्वा असौ भक्त+उद्धरण+हेतवे भिक्षां ययाचे।३।

**श्रीगणेशाय नमः। तेराव्यांत वांझ महिषी दुभवुनि घेई राजाची सेवा। ब्रह्मराक्षसा देउनि सद्गति दाविति सद्गुरु विश्वरूप यतीला।।** अशा रीतीने मागील अध्यायात तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच श्रीगुरूंचे भक्तवात्सल्यही दर्शविले. आता आपल्या आचरणांतून रागद्वेषरहित जीवन्मुक्त जगाला कसे पावन करतात ते दाखवून रागद्वेष न सुटलेला, जरी तो संन्यासी असला तरी, कृतार्थ होत नाही हे दाखविले आहे. नामधारक सिद्धमुनींना विचारतात, भगवान दत्तप्रभूंनी भीमातीराला येऊन काय लीला केली? खरोखर त्यांची लीला सामान्य मानवी बुद्धीला आकलन होण्यास कठीण आहे. तरीही श्रद्धेमुळे ती जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.१. सिद्ध मुनी उत्तरले, कृष्णा-पंचगंगा संगामासारख्याच पावन अशा भीमा-अमरजा संगमासन्निध गाणगापूरला सद्गुरूंनी वास केला.२. आपले माहात्म्य प्रकट न करतां तिथे संगमावरच राहून गाणगापूरांतल्या ब्राह्मणांच्या घरी भक्तांच्या उद्धारासाठीच ते भिक्षा मागीत असत, भूक शमविण्यासाठी नव्हे. कारण त्यांना तहान-भूक इत्यादि विकार नसतात.३.

**दीनभाविकसद्विप्र-दत्तभिक्षाप्रियं द्विजाः । श्रीविद्याढ्या हसन्ति स्म श्रीशं भक्तिप्रियं हरिम् ।।४।।**
**यथार्के प्रसरत्यभ्र-च्छन्नेऽपि द्योत इद्यथा । सम्पुटस्थितकस्तूरी-गन्धस्तद्वद्धरेर्गुणाः ।।५।।**
**एकदा दीनविप्रस्य गेहे च्युतरदां वशाम् । महिषीं प्रेक्ष्य स प्राह ब्राह्मणीं देहि मे पयः ।।६।।**
**सा प्राहेयं वशा भार-वाहिनी नासिकागुणा । योगक्षेममितोऽस्माकं जन्मतोऽपि लुलायवत् ।।७।।**
**मृषा मा वद तां दुग्ध्वा क्षीरं देहीति भाषिता । गुरुणापि वशां दुग्ध्वा काष्ठपात्रेऽलभत्पयः ।।८।।**

दीन+भाविक+सत्+विप्र+दत्त+भिक्षा+प्रियं श्री+ईशं भक्ति+प्रियं हरिं श्री+विद्या+आढ्याः द्विजाः हसन्ति स्म।४। अर्के अभ्र+च्छन्ने अपि यथा द्योत प्रसरति, (यथा वा) सम्पुट+स्थित+कस्तूरी+गंधः इत् तत्+वत् हरेः गुणाः प्रसरन्ति।५। एकदा दीन+विप्रस्य गेहे च्युत+रदां वशां महिषीं प्रेक्ष्य सः ब्राह्मणीं प्राह, मे पयः देही।६। सा प्राह, 'इयं वशा, भारवाहिनी, नासिका+गुणा। जन्मतः अपि लुलायवत्। इतो अस्माकं योगक्षेमम्।'७। 'मृषा मा वद। तां दुग्ध्वा क्षीरं देहि' इति गुरुणा भाषिता वशां अपि दुग्ध्वा काष्ठ+पात्रे पयः अलभत्।८।

लीन, भाविक आणि सदाचारी ब्राह्मणांचीच भिक्षा आवडीने घेणाऱ्या भक्तीचा चाहता अशा त्या लक्ष्मीपती हरीचा गाणगापुरांतील धनवान आणि सुविद्य आणि म्हणूनच गर्विष्ठ असलेले ब्राह्मण कुचेष्टेने उपहास करीत.४. ढगांनी आच्छादलेल्याही सूर्याचा प्रकाश जसा फांकतो, किंवा बंद डबीतील कस्तूरीचासुद्धां सुगंध दरवळतोच त्याचप्रमाणे श्रीगुरूंचे गुणही लवकरच प्रकट झाले.५. एकदा अशाच एका गरीब ब्राह्मणाच्या घरी श्रीगुरू भिक्षेला गेले असतां अन्न तयार नसल्याचे पाहून त्यांनी ब्राह्मणीला भिक्षेसाठी दाराजवळच बांधलेल्या, दांत पडलेल्या वांझ म्हशीची धार काढून दूध द्यायला सांगितले.६. ती गृहिणी म्हणाली 'अहो, ही वांझ म्हैस आहे. जन्मापासूनच आम्ही हिला रेड्यासारखी पोसली आहे. नाकांत वेसण घालून हिला ओझे वाहण्याच्या कामाला देतो. त्यावरच आमचा चरितार्थ चालतो.'७. त्यावर श्रीगुरू म्हणाले, 'उगीच खोटे बोलूं नकोस, (लवकर) तिची धार काढून मला दूध दे!' हे श्रीगुरूंचे बोलणे ऐकून त्या ब्राह्मणीने त्या वांझ म्हशीचीच धार काढायला घेतली. तो काय आश्चर्य, ते लाकडी भांडे दुधाने भरले!८.

**विस्मिता सार्पयत्तस्मै कोष्णं कृत्वा पयो मुदा । पीत्वा क्षीरं ययौ प्रेम्णा श्रीगुरुः संगमं द्रुतम् ।।९।।**
**तत एत्य गृहेशोऽदः श्रुत्वा सस्त्रीक एत्य तम् । गुरुं संपूज्य लब्धेष्ट-वरो हृष्टोऽन्वगाद्गृहम् ।।१०।।**
**अन्येद्युर्भारवाहार्थं वशामाहर्तुमागताः । कृषीवलाः प्रेक्ष्य दोहं शशंसुर्द्राङ् नृपाय तत् ।।११।।**
**नृपोऽप्याकर्ण्य विप्रात्तच्चतुरङ्गबलान्वितः । गुर्वर्थं राजचिह्नानि गृहीत्वा सङ्गमं ययौ ।।१२।।**
**तमेत्य प्रणिपत्योचे दण्डवद्गद्गदाक्षरः । पुलकाङ्कितदेहो राड् दीनं माम्पाहि किङ्करम् ।।१३।।**

सा विस्मिता पयः कोष्णं कृत्वा मुदा तस्मै अर्पयत्। श्रीगुरुः प्रेम्णा क्षीरं पीत्वा द्रुतं संगमं ययौ।९। ततः गृह+ईशः एत्य अदः श्रुत्वा गुरुं एत्य तं संपूज्य लब्ध+इष्ट+वरः हृष्टः गृहं अन्वगात्।१०। अन्ये द्युः भारवाहार्थं वशां आहर्तुं आगताः कृषीवलाः दोहं प्रेक्ष्य तत् द्राक् नृपाय तत् शशंसुः।११। नृपः अपि विप्रात् तत् आकर्ण्य चतुः+अंग+बल+अन्वितः गुरु+अर्थं राज+चिह्नानि गृहीत्वा संगमं ययौ।१२। तं एत्य दण्डवत् प्रणिपत्य गद्गद+अक्षरः पुलकाङ्कित+देहः राट् ऊचे, 'मां किङ्करं पाहि।'१३।

आश्चर्यचकित झालेल्या त्या स्त्रीने ते दूध किंचित् गरम करून श्रीगुरूंना दिले. त्यांनीही अत्यंत प्रेमाने ते पिऊन टाकले आणि लगेच ते संगमाकडे निघून गेले.९. कांही काळाने गृहस्वामी परतले आणि ही सर्व घटना पत्नीकडून ऐकली. लगेच तिला घेऊन ते संगमावर गेले आणि त्यांनी श्रीगुरूंची उत्तम प्रकारे पूजा केली. सद्गुरूंनी प्रसन्न होऊन त्यांना ईप्सित वर दिला आणि आनंदभरित होऊन ते दंपती आपल्या घरी परतले.१०. दुसऱ्या दिवशी कांही शेतकरी ओझे वाहण्यासाठी ती म्हैस घेऊन जायला आले असतां त्यांनी ती दुभती झाल्याचे पाहिले. ते ताबडतोब राजाकडे गेले आणि त्याला हा चमत्कार निवेदन केला.११. राजानेही ब्राह्मणाकडून सर्व खातरजमा करून घेतली आणि आपली चतुरंग सेना बरोबर घेऊन, श्रीगुरूंसाठी पालखी, छत्र-चामरादि राजचिह्ने घेऊन संगमावर आला.१२. ह्या भगवल्लीलेचे श्रवण करून त्या शुद्ध अंतःकरणाच्या राजाचा भक्तिभाव उफाळून आला आणि तो नम्रपणे त्यांच्याकडे आला. श्रीगुरूंजवळ येऊन राजाने दण्डवत घातला. त्याचे अष्ट सात्त्विक भाव उचंबळून आले. रोमांचित होऊन तो सद्गदित आवाजांत म्हणाला, 'ह्या दासाला पदरांत घ्या!'१३.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**दण्डी वनचरोऽस्म्यङ्ग भिक्षुस्त्वं सेनया सह । राजन्कस्मादिहानन्द-संरम्भादागतोऽसि किम् ।।१४।।**

**।। राजोवाच ।।**

**भवान्मायानरो भिक्षुर्नैवास्ति परमेश्वर । हित्वारण्यविहारं भो पावनं कुरु मे पुरम् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) अङ्ग! (अहं) दण्डी वनचरः भिक्षुः अस्मि। (हे) राजन्, इह आनंद+संरम्भात् कस्मात् आगतः असि? किम् (कार्यम्)?'१४. राजा उवाच। '(हे) परमेश्वर, भवान् माया+नरः अस्ति। नैव भिक्षुः। भो, अरण्य+विहारं हित्वा मे पुरं पावनं कुरु।'१५।

श्रीगुरूंनी विचारले, 'अरे राजा, मी तर एक वनवासी, दंडधारी संन्यासी आहे. राजेसाहब, इतक्या आनंदाने आणि समारंभपूर्वक कशासाठी येणे केले? आपले माझ्याकडे काय काम आहे?'१४. राजा म्हणाला, 'भगवंता, आपण मानुष रूप घेतले असले तरी ते आपले खरे स्वरूप नाही. आपण सामान्य संन्यासी तर मुळीच नाहीत. आपण स्वीकारलेला हा वनविहार सोडून माझ्या नगरीत वास करून तिला पावन करावे.' **पुरं** या शब्दाचा दुसरा अर्थ हे मानवी शरीर असाही होतो. याला डोक्यावर सात (डोळे, कान, नाकपुड्या आणि मुख) आणि खाली बेंबीसहित समोरची तीन आणि टाळू अशी अकरा दारे आहेत; दिशा, वायू इत्यादि द्वारपाल आहेत; त्वचा, मांस, रक्त, मेद (चरबी), अस्थी व स्नायू हे प्राकार (दालने) आहेत; मूलाधारापासून आज्ञा पर्यंतची चक्रे ह्या अट्टालिका (galleries) आहेत; रोमरूपी वृक्षांनी त्याचा परिसर बहरलेला आहे; आणि सप्त धातूंनी ते पुरेपूर भरलेले आहे. कठोपनिषदांत (२:२:१) एकादश दारांचे नगर असे म्हटलेलेच आहे. श्रीमद्भगवद्गीतेतही (५:१३) 'नवद्वारे पुरे' असा उल्लेख आहे. हे माझे शरीर मलमूत्रादींनी अपवित्र असले तरी तेच आत्मज्ञानाचे एकमेव साधन असल्याने, आपण ते पावन करावे म्हणजेच आत्मज्ञानाला योग्य करावे, असा त्या राजाच्या प्रार्थनेचा भाव आहे.१५.

**इत्थं श्रुत्वा सकारुण्यमुदारं वाक्यमच्युतः । तथेत्युक्त्वाऽऽययौ प्रेम्णा पुरं पावनपावनः ।।१६।।**
**भेजे छत्रप्रकीर्णै राट् पादचारी सुखासने । उपवेश्य गुरुं विप्र-वाहिते तूर्यनिःस्वनैः ।।१७।।**
**वेदघोषं द्विजाश्चक्रुर्मागधाः स्तोत्रमुत्तमम् । जयघोषं तथाप्यन्य एवं गोपुरमागतः ।।१८।।**
**गुरुः प्रत्यक्पथं पुर्या एत्वाऽश्वत्थे भयङ्करम्। स ब्रह्मराक्षसं शक्रं ददर्शातीन्द्रियः प्रभुः ।।१९।।**
**तद्दर्शनान्नराद्भूत्वा प्रशान्तो ह्यवरुह्य सः । गुरुं नत्वोद्धर हरे कुयोनेर्मेत्युवाच तम् ।।२०।।**

इत्थं सकारुण्यं उदारं वाक्यं श्रुत्वा पावनपावनः अच्युतः 'तथा' इति उक्त्वा पुरं आययौ।१६। राट् (स्वयं) पादचारी गुरुं विप्र+वाहिते सुखासने उपविश्य छत्र+प्रकीर्णैः भेजे।१७। द्विजाः वेदघोषं चक्रुः, मागधाः उत्तमं स्तोत्रं (चक्रुः), तथा अन्ये अपि जयघोषं चक्रुः। एवं गोपुरं आगतः।१८। गुरुः प्रत्यक्+पथं पुर्या एत्वा सः अतीन्द्रियः प्रभुः अश्वत्थे भयङ्करं शक्रं ब्रह्मराक्षसं ददर्श।१९। तत्+दर्शनात् सः प्रशांतः भूत्वा नरात् अवरुह्य गुरुं नत्वा तं उवाच, '(हे) हरे मे कुयोनेः उद्धर', इति।२०।

हे त्याचे काकुळतीचे पण प्रौढ बोलणे ऐकून अग्नी, वायू, सोम, सूर्य, इन्द्र इत्यादि पावन देवतांनाही पावन करणारे अच्युत श्रीगुरु 'ठीक आहे,' असे म्हणून नगराकडे निघाले.१६. स्वतः पायउतार होऊन राजाने श्रीगुरूंना ब्राह्मणांनी वाहिलेल्या पालखीत बसविले आणि त्यांच्यावर छत्र-चामर धरून, मंगलवाद्यांच्या गजरांत नगराकडे आणले.१७. ब्रह्मवृंद वेदमंत्रांचा घोष करीत होते, भाट उत्तम स्तवनांनी स्तुती करीत होते आणि इतरही सगळे श्रीगुरूंचा जयजयकार करीत होते. अशा रीतीने ती मिरवणूक गांवाच्या वेशीजवळ आली.१८. श्रीगुरूंनी पश्चिमेकडील वाटेने नगरांत प्रवेश करतांच त्यांना समोरच्या पिंपळावर एक भयानक आणि घातक ब्रह्मराक्षस दिसला. **अतींद्रिय** या विशेषणाने श्रीगुरूंचे इंद्रियातीत विषयांचे ज्ञान सूचित केले आहे. तसेच **प्रभुः** या विशेषणाने त्यांचे निग्रहानुग्रह सामर्थ्यही सूचित केले आहे.१९. त्या श्रीगुरूंच्या दर्शनाने तो राक्षस एकदम शांत झाला. पिंपळावरून उतरून श्रीगुरूंना नमस्कार करून तो म्हणाला, 'हे हरी, या कुत्सित योनींतून मला मुक्त करा.'२०.

**करस्तन्मूर्ध्नि विन्यस्तो गुरुणाथाभवन्नृवत् । तमाह संगमस्नानाच्छीघ्रं मुक्तो भविष्यसि ।।२१।।**
**इति श्रुत्वा नमस्कृत्य गुरुं स्नात्वा स संगमे । विहाय भौतिकं कायं मुमुचे कर्मबन्धनात् ।।२२।।**
**दृष्ट्वेदं राडभिष्टूय तस्मा आम्रेडितोक्तिभिः । पुरं नीत्वा सुमठिकां निर्मायास्मा उपानयत् ।।२३।।**
**खेदं विनयते स्मेश-पूजारार्तिकगायनैः । घोरं सांसारिकं प्रेम्णा नित्यं तदनुगो नृपः ।।२४।।**

गुरुणा तत्+मूर्ध्नि करं विन्यस्तः। अथ स नृवत् अभवत्। तं (श्रीगुरुः) आह, 'संगम+स्नानात् शीघ्रं मुक्तः भविष्यसि।'२१। इति श्रुत्वा सः गुरुं नत्वा, संगमे स्नात्वा, भौतिकं कायं विहाय कर्म+बंधनात् मुमुचे।२२। इदं दृष्ट्वा राट् तस्मै आम्र+ईडित+उक्तिभिः अभिष्टूय पुरं नीत्वा सुमठिकां निर्माय अस्मै उपानयत्।२३। सः संगमे आह्निकं, ग्रामे भिक्षां, मठे निवसतिं कृत्वा भगवान् भक्त+वात्सल्यात् राण्+निघ्नः अभूत्।२४।

श्रीगुरूंनी त्याच्या मस्तकावर हात ठेवतांच त्याचा देह मानवसदृश झाला. त्याला श्रीगुरू म्हणाले, 'संगमात स्नान केलेस की लगेच तूं मुक्त होशील.'२१. हे श्रीगुरूंचे शब्द कानांवर पडतांच तो त्यांना नमस्कार करून संगमावर गेला. तिथे स्नान करून त्याने पांचभौतिक देहाचा त्याग केला आणि तो कर्मबंधनांतून मुक्त झाला.२२. हा सर्व चमत्कार पाहून राजाने पुनःपुनः स्तुतिवचनांनी त्यांचा गौरव केला आणि त्यांना गाणगापुरांत घेऊन गेला. तिथे त्याने एक सुंदरशी मठी बांधून ती श्रीगुरूंना राहण्यासाठी अर्पण केली.२३. ते श्रीगुरू संन्यासाश्रमाला उचित असे शौच, स्नान, दंडतर्पण, ॐकाराचा जप, भिक्षा, ध्यान इत्यादि आह्निक संगमावर करीत; भिक्षेसाठी गांवांत येत; आणि मठांत निवास करीत. ज्ञानी पुरुषांनीसुद्धां लोकसंग्रहासाठी नित्यकर्माचे अनुष्ठान करावे ह्या सत्संप्रदायाचा धडाच ते स्वतःच्या आचरणांतून घालून देत होते. भक्तवत्सल प्रभू राजाचा भाव पाहून त्याच्या अधीन राहत. त्याच्या इच्छेनुसार वागत.२४.

**आह्निकं संगमे भिक्षां ग्रामे निवसतिं मठे । स कृत्वा भक्तवात्सल्याद्राण्निघ्नो भगवानभूत् ।।२५।।**
**श्रुत्वाऽऽश्रमानर्हचेष्टामस्यामंस्ताल्पधीर्यतिः । भ्रष्टोऽयं दाम्भिक इति तं त्रिविक्रमभारती ।।२६।।**
**तज्ज्ञात्वाशेषहृत्संस्थः सर्वसाक्षी जगत्प्रभुः । भूपं प्राहाद्य गन्तव्यं निन्दकार्दनहेतवे ।।२७।।**
**मन्निन्दकोऽस्ति कुमसी-ग्रामे भिक्षुस्त्रिविक्रमः । इति श्रुत्वा नृपो हृष्टो गमनायोपचक्रमे ।।२८।।**

नृपः ईश+पूजा+आरार्तिक+गायनैः घोरं सांसारिकं खेदं विनयते स्म प्रेम्णा नित्यं तत्+अनुगः (अभूत्)।२५। आश्रम+अनर्ह+चेष्टा श्रुत्वा अल्पधीः त्रिविक्रमभारती यतिः अयं भ्रष्टः दाम्भिकः इति अमंस्त।२६। अशेष+हृत्+संस्थः सर्वसाक्षी जगत्+प्रभुः तत् ज्ञात्वा भूपं प्राह, निंदक+अर्दन+हेतवे गन्तव्यम्।२७। कुमसी+ग्रामे त्रिविक्रमः भिक्षुः मत्+निंदकः अस्ति। इति श्रुत्वा हृष्टः नृपः गमनाय उपचक्रमे।२८।

राजा नित्यनेमाने श्रीगुरूंची पूजा, आरती आणि भजन करून आपल्या घोर प्रापंचिक दुःखांचे उपशमन करू लागला आणि प्रेमभक्तीपूर्वक त्यांचा अनुचर होऊन राहिला. साध्या गायनाच्या श्रवणानेही श्रोता तल्लीन होऊन आपल्या शारीरिक दुःखाचा ठणका कांही काळ तरी विसरतो. मग ईश्वराच्या पूजा, आरती आणि भजनानेही विद्यमान त्रिविध सांसारिक तापांचे शमन होतेच यांत काय आश्चर्य?२५. श्रीगुरूंच्या ह्या संन्यासाश्रमाला अनुचित अशा वर्तनाने जवळच कुमसी गांवात राहणाऱ्या त्रिविक्रमभारती नांवाच्या संन्याशाने, अल्पबुद्धीने श्रीगुरूंविषयी, ‘ हा भ्रष्ट आणि दांभिक संन्यासी आहे,’ असा समज करून घेतला.२६. त्या त्रिविक्रमभारतीच्या मनांतला हा किंतु सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी जगदीशच असलेल्या श्रीगुरूंपासून लपून राहिला नाही. ते राजाला म्हणाले, ‘आपल्याला एका निंदकाला धडा शिकविण्यासाठी जायचे आहे.’२७. ‘कुमसी गांवी त्रिविक्रम नांवाचा संन्यासी माझी निंदा करतो.’ हे ऐकून सद्गुरूंच्या सेवेची संधी मिळाल्याने आनंदित होऊन राजाने जाण्याची सर्व तयारी केली. इथे राजा कदाचित् ‘आपण कशाला कष्ट घेतां? मीच त्या निंदकाला शिक्षा करतो,’ असे म्हणेल यासाठी तो निंदक संन्यासी आहे हे श्रीगुरूंनी स्पष्ट केले आहे. संन्याशाला, तो अपराधी असला तरी, दंड करण्याचा अधिकार राजाला नाही हे सूचित केले आहे.२८.

**सुपालके तूपवेश्य नृपचिह्नैः परिष्कृतम् । श्रीगुरुं कुमसीग्रामं निन्ये राड् यत्र भारती ।।२९।।**
**नृसिंहध्याननिष्ठोऽपि स तदा योगिमायया । सम्भूय चञ्चलमना आजह्वे स्तोतुमीश्वरम् ।।३०।।**
**सुप्रसन्न नृसिंहेश दयाब्धे भक्तभावन । कस्मात्तेऽद्य न सामीप्यं ध्याने स्तोष्ये दयस्व भोः ।।३१।।**
**स्तुत्वैवं स नदीतीरे ध्यानाज्ज्ञात्वा स्थितं विभुम् । त्रस्तचित्तोऽभ्यगाद् द्रष्टुमचिन्त्याव्यक्तविग्रहम् ।।३२।।**
**त्रिविक्रमो जवेनैत्य योगिमायावृतान्तरः । उच्चावचान्यतीन्दृष्ट्वा भूरिशो मोहमाप सः ।।३३।।**

नृपचिह्नैः परिष्कृतं श्रीगुरुं सुपालके तु उपवेश्य राड् कुमसीग्रामे, यत्र भारती, निन्ये।२९। सः नृ+सिंह+ध्यान+निष्ठः अपि तदा योगि+मायया चञ्चल+मना सम्भूय ईश्वरं स्तोतुं आजह्वे।३०। (हे) नृसिंह+ईश, दया+अब्धे भक्त+भावन, अद्य ध्याने कस्मात् ते सामीप्यं न? भोः दयस्व, स्तोष्ये।३१। एवं स्तुत्वा स ध्यानात् विभुं नदीतीरे स्थितं ज्ञात्वा त्रस्त+चित्तः अचिन्त्य+अव्यक्त+विग्रहं द्रष्टुं अभ्यगात्।३२। योगि+माया+आवृत+अंतरः त्रिविक्रमः जवेन एत्य भूरिशः उच्च+अवचान् यतीन् दृष्ट्वा सः मोहं आप।३३।

छत्र-चामरादि राजचिह्नांनी सजविलेल्या श्रीगुरूंना उत्तम पालखीत बसवून राजाने त्यांना कुमसी गांवी त्रिविक्रमाकडे नेले.२९. **नृ** म्हणजे जीव, त्याची **सिं** म्हणजे अविद्या **ह** म्हणजे हरण करणारा जो परमात्मा त्या नृसिंहाचे ध्यान त्रिविक्रम यती करीत असत. त्या वेळी मात्र त्यांच्या ध्यानात नेहमी येणारे नरसिंहाचे रूप योगेश्वर श्रीगुरूंच्या मायेने येईना. अशा रीतीने चलच्चित्त झालेल्या यतीने आपल्या इष्टदेवाचे - नृसिंहाचे स्तवन आरंभिले. 'हे दयासागरा, भक्तपालका नृसिंहदेवा, आज ध्यानांत आपण कां बरे येत नाहीत? देवा, दया करा, मी आपले स्तवन करीत आहे!'३१. अशी स्तुती केल्यानंतर त्या त्रिविक्रमाने ध्यानाने प्रभू नदीकांठी असल्याचे जाणून तो ज्याचे स्वरूप अचिंत्य आणि अव्यक्त आहे अशा भगवंताच्या दर्शनासाठी व्याकुळ मनाने नदीकांठी आला.३२. श्रीगुरूंच्या मायेचा चित्तावर पगडा असलेला त्रिविक्रम धावत धावतच तिथे येऊन पाहतो तर त्याला जिकडे तिकडे लहान-मोठे खूपसे संन्यासीच दिसू लागले. त्या विपरीत दर्शनाने त्याचा विवेक हतबल झाला आणि तो पुरता गोंधळून गेला.३३.

**व्यालोकि परितस्तेन सर्वे संन्यासिरूपिणः । ज्यायांसोऽपि कनीयांसः प्रशान्ता दण्डिनोऽमिताः ।।३४।।**
**आहेशो विस्मितं तं यं धिक्करोष्यस्मि दाम्भिकः । भ्रष्टः स इन्मयोद्भाव्य मायामसि परीक्षितः ।।३५।।**
**नृसिंहचिन्तकोऽसि त्वं यतिधर्मसुशिक्षितः । संन्यासी लोकविज्ञातः संन्यस्तं ब्रूहि किं त्वया ।।३६।।**
**न्यस्तसूत्रशिखो दण्डी रागद्वेषाकुलान्तरः । वेषानुकारी संन्यासी धर्मज्ञो वा भवेदपि ।।३७।।**

ईशः तं विस्मितं आह, 'यं धिक्+करोषि सः दाम्भिकः भ्रष्टः अस्मि। इत् मया मायां उद्भाव्य परीक्षितः असि।'३४। तेन परितः सर्वे ज्यायांसः कनीयांसः अपि प्रशांता अमिताः संन्यासिरूपिणः दण्डिनः व्यालोकि।३५। 'त्वं नृसिंह+चिंतकः यति+धर्म+सुशिक्षितः संन्यासी असि। त्वया किं संन्यस्तं?' ब्रूहि।३६। न्यस्त+सूत्र+शिखः दण्डी वेष+अनुकारी धर्मज्ञः वा राग+द्वेष+आकुल+अंतरः संन्यासी भवेत् अपि?३७।

त्याला आजूबाजूला सगळीकडे लहान-थोर अगणित दंड धारण केलेले प्रशांत संन्यासीच दिसूं लागले!३४. आश्चर्याने स्तिमित झालेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'ज्याचा दांभिक आणि भ्रष्ट संन्यासी म्हणून तूं धिक्कार करतोस तोच मी आहे. मीच माया पसरून तुझी परीक्षा घेत आहे.'३५. 'तू नरसिंहाचे ध्यान करतोस, संन्यासधर्माचे उत्तम शिक्षण घेतले आहेस आणि लोकांत तुझे चांगले नांव आहे! मला सांग, तू कशाचा संन्यास (त्याग) केला आहेस?'३६. 'शेंडी कापून आणि जानवे तोडून, हातांत दंड धरून, केवळ संन्याशाचा वेष धारण केला किंवा संन्यासधर्माचा कोरडा अभ्यास केला तरी, जोवर चित्त राग (आसक्ती) आणि द्वेष यांनी व्यापलेले आहे तोवर कुणी संन्यासी होईल कां?'३७.

**दम्भिलक्षणजिज्ञासुरागतोऽस्म्यद्य कृत्स्नशः । त्वं नृसिंहप्रसादेन विद्वंस्तद्वक्तुमर्हसि ।।३८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**प्रत्याहतमतिस्तेऽस्मि भगवन्नीश मायया । नापि वक्तुं हृषीकेश शक्यः पाहि दयानिधे ।।३९।।**

(अहं) दम्भि+लक्षण+जिज्ञासुः आगतः अस्मि। (हे) विद्वन् त्वं नृसिंहप्रसादेन वक्तुं अर्हसि।'३८। त्रिविक्रम उवाच। '(हे) भगवन्, ईश, (अहं) ते मायया प्रति+आहत+मतिः अस्मि। (हे) हृषीकेश वक्तुं अपि न शक्यः। (हे) दयानिधे, पाहि।३९।

'माझ्या वागण्याचा विचार करतांना तूं 'सर्वाठायी आत्मस्वरूपाचा (आपल्याच स्वरूपाचा) साक्षात्कार झाल्यावर कुणी कुणाला पाहायचे?' ह्या बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) याज्ञवल्क्याने मैत्रेयीला केलेल्या उपदेशानुसार 'आत्मसाक्षात्कारी पुरुष सर्व पाहणे, हुंगणे इत्यादि संवेदनारहित दगडासारखा क्रियाशून्य असतो' एवढेच लक्षांत घेतले. छांदोग्यांत (८:१२:३) इंद्राला प्रजापतीने सांगितले आहे की, 'आत्मज्ञानाच्या उंचीवर पोचलेला उत्तम पुरुष स्त्रियांशी वा यानांशी रमतांना दिसला तरी त्याला देहात्मभाव नसतो.' हे तूं विसरलास! आत्मदर्शनाच्या विषयी सांख्यांनी तो देहापासून वेगळा असल्याचे जाणूनही, वेदांचा सिद्धांत न मानल्याने बुद्धी आणि आत्मा यांच्या भेदज्ञानाशीच ते अडून राहिले; कणादादि वैशेषिक विविध रंगांच्या क्षारांत वस्त्राचा शोध घ्यावा तसे नऊ गुणांनी युक्त (गुणातीत) आत्मतत्त्वाचा मागोवा घेत राहिले; तसेच कर्मिष्ठ पूर्वमीमांसक वेदांचे प्रामाण्य मानूनही बाह्य विषयांतच चित्त हरवून बसले आणि त्यांना आत्मैक्यरूप परमार्थसत्य नाशिवंत भासले; हे सगळे रहाटगाडग्यासारखे फिरतच राहिले. संन्यासी असूनही - शांकर अद्वैत सिद्धांताचा स्वीकार करूनही, तुझी त्यांच्यासारखीच अवस्था झालेली दिसते. तूं मला दाम्भिक म्हणतोस ना? तर दाम्भिकाची काय लक्षणे असतात ते तुझ्याकडून समजून घ्यायला मी आलो आहे.'३८. त्रिविक्रम म्हणाला, 'भगवंता, परमेश्वरा, तुझ्या मायेने माझी बुद्धी कुंठित झाली आहे. सर्व इंद्रियांच्या नियंत्या, मला कांही बोलणेही अशक्य झाले आहे. दयासागरा, माझे रक्षण करा!'३९.

**प्रपन्नोऽस्मि क्षमस्वेश मन्तून्मे ध्यानपुण्यतः । साक्षाद्दृष्टं हि ते धाम नृसिंहोऽसि दयस्व भोः ।।४०।।**
**इति स्तुवति तस्मिन्स भगवान्पूर्वरूपतः । प्रादुरासीत्तथाप्यन्ये सैन्या मन्त्री नृपः स्फुटम् ।।४१।।**
**सैन्यमध्ये स्थितं भूप-वीजितं च त्रिविक्रमः । विश्वरूपं स्वनेत्रेण न शशाकापि वीक्षितुम् ।।४२।।**
**तमाह दुर्निरीक्ष्यं मे रूपं दिव्यदृशापि ते । दर्शितं ध्यानहृष्टेन धामाथो पश्य लौकिकम् ।।४३।।**
**ततः प्रशान्तसंन्यासि-रूपेणावस्थितं हरिम् । दृष्ट्वा प्रकृतिगः प्राह भगवन्तं त्रिविक्रमः ।।४४।।**

प्रपन्नः अस्मि। हे ईश, मे मन्तून् क्षमस्व। ध्यान+पुण्यतः हि ते धाम साक्षात् दृष्टम्। भोः नृसिंहः असि। दयस्व!'४०। इति तस्मिन् स्तुवति भगवान् पूर्व+रूपतः प्रादुरासीत्। तथा अन्ये, सैन्या, मन्त्री, नृपः अपि स्फुटम् (प्रादुरासीत्)।४१। सैन्यमध्ये स्थितं भूप+वीजितं विश्वरूपं त्रिविक्रमः स्वनेत्रेण वीक्षितुं न शशाक।४२। तं (श्रीगुरुः) आह। 'दिव्यदृशा अपि दुर्निरीक्ष्यं मे रूपं ध्यान+हृष्टेन (मया) ते दर्शितम्। अथो लौकिकं धाम पश्य।'४३। ततः प्रशांत+संन्यासि+अवस्थितं हरिं दृष्ट्वा प्रकृतिगः त्रिविक्रमः भगवन्तं प्राह।४४।

हे ईश्वरा! मी तुला शरण आलो आहे. माझे अपराध पोटांत घ्या. ध्यानाभ्यासाच्या पुण्याईने मला आज आपले स्वरूप साक्षात् पहायला मिळाले. आपण प्रत्यक्ष नरसिंहच आहांत! माझ्यावर दया करा.'४०. अशा प्रकारे त्रिविक्रमाची प्रार्थना ऐकून भगवान् श्रीगुरू आपल्या पूर्व रूपाने प्रकट झाले. तसेच सेनेसह राजा आणि मंत्रीगणही स्पष्ट दिसूं लागले.४१. सैन्याच्या मध्यभागी राजाने हातांतील चामर वारा घातलेले, श्रीगुरूंनी प्रकटविलेले विश्वरूप त्रिविक्रमाच्या चर्मचक्षूंना पहावले नाही. ते त्याच्या डोळ्यांत सामावेना.४२. विश्वरूपाने दिपलेल्या त्या त्रिविक्रमाला श्रीगुरू म्हणाले, 'योगादि सायास करूनही दिव्यदृष्टीलाही पहायला कठीण असे हे माझे विश्वरूप तुझ्या ध्यानाभ्यासाने प्रसन्न होऊन तुला दाखविले आहे. आतां हे लौकिक रूप पाहा.'४३. मग त्रिविक्रमाला प्रशांत संन्यासी रूपांत समोर पालखीत बसलेले पापतापहर श्रीगुरू दिसू लागले. आपल्या सहज अवस्थेत येऊन तो प्रभूंना म्हणाला.४४.

**कायेन मनसा वाचा केवलैरिन्द्रियैरपि । असत्कृतोऽसि विश्वात्मन्मया त्वां क्षामयेऽद्य तत् ।।४५।।**
**धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि कृतकार्योऽस्मि दर्शनात् । रूपं पुराऽर्जुनायेदं दर्शितं मेऽद्य तत्पुनः ।।४६।।**
**हरेऽविद्याप्रवाहे मां मज्जन्तं ज्ञाननौकया । कृपामरुत्संगतया स्वात्मरूपतटं नय ।।४७।।**

(हे) विश्व+आत्मन्, कायेन, मनसा, वाचा, केवलैः इन्द्रियैः अपि वा मया असत्+कृतः असि तत् त्वां अद्य क्षामये।४५। 'दर्शनात् धन्यः अस्मि! अनुगृहीतः अस्मि! कृतकार्यः अस्मि! पुरा इदं रूपं अर्जुनाय दर्शितं तत् अद्य पुनः मे (दर्शितम्)।४६। (हे) हरे, अविद्या+प्रवाहे मज्जन्तं मां ज्ञान+नौकया कृपा+मरुत्+संगतया स्व+आत्म+रूपं तटं नय।४७।

'हे विश्वरूप प्रभो, मी ज्या ज्या कांही शारीरिक (हातवारे करून, बोट दाखवून, तोंड वांकडे करून इत्यादि), मानसिक (आपल्याविषयी कुत्सित भाव धरून), वाचिक (धिक्कारादि उच्चारण) कृतींनी अथवा केवळ इंद्रियांनीसुद्धा आपला अधिक्षेप केला त्यांचा मला पश्चाच्चाप होत आहे. मी त्या सर्व अपराधांसाठी आपल्याजवळ क्षमायाचना करीत आहे.'४५. 'आपण दिलेल्या या दर्शनाने मी धन्य झालो आहे! अनुगृहीत झालो आहे! कृतकृत्य झालो आहे! पूर्वी अर्जुनाला दाखविलेले हे विश्वरूप आज आपण मला दखविले आहे!.४६. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा तीन प्रकारच्या दुःखांचे हरण करणाऱ्या हरी, अविद्यारूप जलप्रवाहांत बुडत असलेल्या मला, आपल्या कृपेच्या वाऱ्याने परोक्ष आत्मज्ञानरूपी नौकेला प्रेरवून, जीवात्मा आणि परमात्मा यांच्या अखंडैकरसरूपाच्या (अपरोक्ष ज्ञानरूपी) पैलतीराला पोचवा.' हा रूपक अलंकार आहे.४७.

**तीर्त्वाऽविद्यानदीं ज्ञान-प्लवेन परमं पदम् । द्राग्यास्यत्रैव तिष्ठेति तमुक्त्वा श्रीगुरुर्ययौ ।।४८।।**

श्रीगुरुः तं, 'ज्ञान+प्लवेन अविद्या+नदीं तीर्त्वा द्राक् यासि। अत्रैव तिष्ठ,' इति उक्त्वा ययौ।४८।

त्रिविक्रमाच्या प्रार्थनेवरून हा परमार्थाच्या उपदेशाला योग्य होऊन आपल्याला शरण आला आहे असे पाहून श्रीगुरूंनी त्याला सांगितले की, *'तत्त्वमसि'* इत्यादि महावाक्यांच्या श्रवणाने आणि भागत्यागलक्षणेने निश्चित केलेले अत्मस्वरूपाचे (परोक्ष) ज्ञान हीच नौका ह्या अविद्यारूपी नदीला पार करण्याचे साधन आहे. श्रवण-मनन-निदिध्यासन यांनी अभानावरणरूप अविद्येचा, आणि चिदन्वयदृष्ट्या - सर्व ठिकाणी चैतन्यच पाहत, अवशिष्ट प्रारब्धाचा भोग भोगून विक्षेपरूप अविद्येचा अपक्षय करावा. असे केल्याने देशादि परिच्छेद आणि त्रिविधभेद (सजातीय, विजातीय आणि स्वगत) यांच्या पलीकडचे योग्यांनाच लाभणारे प्रत्यगात्मा आणि परमात्मा यांचे अभिन्न स्वरूप ह्याच जन्मी तूं निश्चित पावशील. (तुला पुन्हां जन्म घ्यावा लागणार नाही असा आशय.) तूं इथेच स्थिर हो. इथे म्हणजे नृसिंहाचे ध्यान आणि तत्त्वज्ञानाचे विवेचन यांतच स्थिर हो म्हणजे मनाची गती थांबव. इथेच म्हणजे आत्मरूपांतच स्थिर हो. देहादि अनात्म विषयांचा विचार सोड. 'मी संन्यासी आहे, शौच, आचार, जप करणे मला आवश्यक आहे. जे संन्यासी असे करीत नाहीत ते निंद्य आहेत. जे अनुष्ठान करतात ते वंद्य आहेत' असा दुराग्रह, 'हे सर्व जगत् ईश्वराने व्यापलेले आहे' (ईशोपनिषत् १) ह्या श्रुतीला स्मरून अजिबात सोडून दे. ईशावास्यांतच (ईशोपनिषत् २, ११) 'कर्मांचे अनुष्ठान करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी', इत्यादि उपदेश असला तरी सर्व एषणांचा त्याग केलेल्या तुझ्यासारख्या अधिकारी पुरुषाला त्याचे अनुष्ठान अनुचित आहे. कारण त्याने चित्तविक्षेप होऊं शकतो, जो ज्ञानाला अडसर ठरतो.' (अर्थात परमेश्वराला विमुख असलेल्या साधनरहित सामान्य जीवांना आपापल्या आश्रमांचे अनुष्ठान केलेच पाहिजे.

**क्षणात्ससैन्यभूपेन साकमेत्य मठं प्रभुः । कर्ममार्गं ततानेशश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ।।४९।।**

**इति श्रीगुरुचरिते ज्ञानयोगे भीमामरजासंगमनिवासो नाम त्रयोदशोऽध्यायः ।।१३।।**

प्रभुः क्षणात् ससैन्यं भूपेन साकं मठं एत्य लोकसंग्रहं चिकीर्षुः ईशः कर्म+मार्गं ततान।४९।

अन्यथा त्यांना प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो आणि प्रपंच आणि परमार्थ या दोहोंपासून ते भ्रष्ट होतात. हे यांत सुचविलेले आहे.) असा त्याला उपदेश करून श्रीगुरू मठाला परतले.४८. मग प्रभू राजा आणि सर्व सेना यांना घेऊन योगगतीने लगेच मठाला परतले; आणि 'मीच जर आश्रमोचित कर्मांचा त्याग केला तर लोकही तसेच वागूं लागतील (भ.गीता ३:२३-२५) आणि मी अनर्थाला कारण होईन यासाठी मी स्वतः धर्माचे अनुष्ठान करून इतरांकडूनही ते करवून घेईन', अशा लोकसंग्रहाच्या इच्छेने भगवंतांनी कर्ममार्गाचा प्रसार केला.४९.

या अध्यायाबरोबरच द्विसाहस्रीतील ज्ञानकांड पूर्ण होऊन पुढच्या अध्यायापासून पांच अध्यायांत कर्मयोगाची मांडणी केली आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा तेरावा अध्याय इथे पूर्ण झाला.**
**तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।।चतुर्दशोऽध्यायः।।

**।। नामधारक उवाच ।।**

**ज्ञानयोग इयानुक्तः सिद्ध्यै संन्याससत्पथः। कुतो भगवता पश्चात्कर्मयोगः प्रकाशितः ।।१।।**

नामधारक उवाच। 'सिद्ध्यै संन्यास+सत्+पथः इयान् ज्ञानयोगः उक्तः। भगवता पश्चात् कुतो कर्मयोगः प्रकाशितः?१।

**श्रीगणेशाय नमः। तेरा अध्यायांत झाले ज्ञानकांडाचे निरूपण। चित्त शुद्ध जयाचे तो यायोगे तोडी कर्मबंधन।।१।। चित्त जयाचे शुद्ध नसे तयाचे पापकर्म नासून। वैराग्य उदयासाठी पांच अध्यायीं कर्मकांडविवेचन।।२।। चौदाव्या अध्यायीं मत्त ब्राह्मणां वेदसार सांगती। श्रीगुरु त्यापरी अंत्यजाकरवी विप्रगर्व परिहरती।।३।।**

नामधारक विचारीत आहे. 'ना कर्म, ना संतति ना संपत्ती या कशानेच अमृतत्वाची प्राप्ती होत नाही, ती एका त्यागानेच होते;' (कैवल्य उ. ३) 'अंधःकाराच्या पलीकडच्या त्या सूर्यसंकाश महान पुरुषाला जाणल्यानेच मृत्यूला ओलांडतां येते; यापेक्षां अन्य मार्ग नाही;' (श्वेताश्वतर उ. ३:८) 'ब्रह्माला जाणणाराच परमपद पावतो;' (तैत्तिरीय उ. २:१:१) ह्या आणि इतरही अनेक श्रुतिवचनांनी कर्मसंन्यासपूर्वक श्रवणादि साधनांनी ज्ञान झाल्यावरच मोक्षाची प्राप्ती होते असे सांगितले आहे. तसेच कर्माने जीव बांधला जातो, असे संन्यासोपनिषदांत व अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणे संन्यास हाच मोक्षाचा उत्तम मार्ग आहे असा ज्ञानयोगाचाही उपदेश केला. मग आतां भगवंत कर्ममार्गाचे प्रतिपादन कां करीत आहेत?'१.

**अविद्याघातकं कर्म तदुत्थं कथमित्यमुम् । छिन्धि मे संशयग्रन्थिम् भगवच्चरितासिना ।।२।।**

'तत्+उत्थितं कर्म कथं अविद्या+घातकम्? अमुं मे संशय+ग्रन्थिं भगवत्+चरित+असिना छिन्धि।'२।

'नवव्या अध्यायांत (द्वि.सा. ९:७०) श्रीगुरूंनीच शिष्यांना उपदेश करतांना स्वाश्रमाला उचित असे कर्म करावे अन्यथा पतन होते. असा उपदेश शिष्यांना केला आहे. मग अशी शंका कां घेतोस?' असा प्रश्न अपेक्षून नामधारक आपला प्रश्न अधिक स्पष्ट करतात. 'अविद्येपासून अविवेक, अविवेकाने देहादि उपाधींचा अभिमान, अभिमानापासून रागद्वेष आणि त्या रागद्वेषांमुळेच कर्म अशा परंपरेने कर्म हे अविद्येपासून निपजलेले आहे. तिच्यापासूनच उद्भवलेले कर्म अविद्येच्याच घाताला कसे कारण होईल? ही माझ्या मनांत पडलेली संशयाची गाठ आपण भगवच्चरित्ररूपी खड्गाने छेदावी.'२.

नामधारकाच्या प्रश्नाचे उत्तर कर्माचा आणि आत्मज्ञानाचा परस्परसंबंध समजून घेऊनच देतां येईल. याविषयी आरंभीच ब्रह्मसूत्राच्या (३:४:२५) आधारे केवळ ज्ञानानेच मोक्ष होतो, त्याला इतर कोणत्याही साधनाची अपेक्षा नाही हे दृढ करतात. सूत्रांत सांगितल्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या हेतूने सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाला अग्नी वा इंधन (समिधा) यांची उठाठेव करण्याची आवश्यकता नाही. आपल्या ज्ञानोपासनेच्याच बळावर तो आपले आत्मप्राप्तीचे ध्येय गाठूं शकतो. हा सिद्धांत दृढ केल्यावर श्रीस्वामिमहाराज त्याच्याच पुढच्या (३:४:२६) सूत्राधारे ज्ञानाच्या मोक्षप्राप्तीच्या कार्याला अन्य कशाचीही (कर्माची) अपेक्षा नसली तरी त्या ज्ञानाच्या उत्पत्तीला मात्र कर्म नितांत आवश्यक आहे. म्हणजेच कर्म हे ज्ञानाचे कारण आहे. ज्ञान आणि कर्म यांचा असा साध्य-साधन संबंध आहे. ज्ञानोत्पत्तीसाठी कर्मे दोन प्रकारे कारणीभूत होतात. १. संस्कारांनी आणि २. विविदिषा उत्पन्न करून.

**संस्कार -** गौतमसूत्रांत खालील चाळीस संस्कारांचा उल्लेख केलेला आहे.

१. गर्भाधान, २. पुंसवन, ३. सीमन्तोन्नयन, ४. जातकर्म, ५. नामकर्म, ६. अन्नप्राशन, ७. चौल, ८. उपनयन.

### ॥ सिद्ध उवाच ॥

**कर्कटीं तद्भवा घ्नन्ति यथा मृत्क्षालनं मृदा । तथाऽविद्या च कर्मापि कर्मणैव विलीयते ॥३॥**

सिद्ध उवाच। 'यथा कर्कटीं तत्+भवा घ्नन्ति, मृदा मृत्+क्षालनं तथा अविद्या च कर्म अपि कर्मणा एव विलीयते।३।

९. प्राजापत्य, १०. सोम्य, ११. आग्नेय, १२. वैश्वदेव ही चार वेदव्रते.

१३. स्नान (सोडमुंज), १४. सहधर्मिणीसंयोग (विवाह).

१५. देवयज्ञ, १६. भूतयज्ञ, १७. पितृयज्ञ, १८. ब्रह्मयज्ञ आणि १९. मनुष्ययज्ञ हे पांच महायज्ञ.

२०. अष्टका, २१. अन्वष्टका, २२. पार्वणश्राद्ध, २३. श्रावणी, २४. आग्रहायणी, २५. चैत्री आणि २६. आश्वयुजी हे सात पाकयज्ञ.

२७. अग्न्याधान, २८. अग्निहोत्र, २९. दर्शपूर्णमास, ३०. आग्रयण, ३१. चातुर्मास्य, ३२. निरूढपशुबंध, ३३. सोत्रामणि हे सात हविर्यज्ञ.

३४. अग्निष्टोम, ३५. अत्यग्निष्टोम, ३६. उक्थ्यः ३७. षोळशी, ३८. वाजपेय, ३९. अतिरात्र, ४०. आप्तोर्याम हे सात सोमयाग.

'ह्या चाळीस संस्कारांनी युक्त ब्राह्मण सायुज्यता आणि सलोकता या मुक्तींचा अधिकारी होतो असे गौतम स्मृतीचे (८ः१४-२४) वचन आहे. कुठे सोळा, कुठे चोवीस तर कुठे अठ्ठेचाळीस संस्कारांचेही वर्णन आहे. ह्या संस्कारांनी संस्कारित झालेल्या पुरुषाचे चित्तच आत्मज्ञानाला योग्य होते.'

**विविदिषा -** बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२२) सांगितल्याप्रमाणे वेदाभ्यास, यज्ञ, दान, तप, उपवास यांनी ब्राह्मणाला विविदिषा उत्पन्न होते. ब्रह्मसूत्रकारांनीही आश्रमकर्म विहितच असल्याने ते केले पाहिजे (३:४:३२) असे म्हणत याचीच पुष्टी केली आहे. स्कंपुराणान्तर्गत सूतसंहितेत (यज्ञवैभव खंड २:६८-६९) असे म्हटले आहे की

महापापी लोकांना ज्ञानयज्ञाविषयी रुची तर नसतेच, उलट ते त्याचा तिरस्कारच करतात. ज्ञानाला प्रतिबंध करणारी पापे, विहित कर्मे परमेश्वरार्पण बुद्धीने केल्याने नाश पावतात. अशा रीतीने चित्तशुद्धी झाल्यानंतर श्रवणादिकांची गोडी लागते. हीच जिज्ञासा किंवा विविदिषा! वार्तिकसाराच्या (३) वचनानुसार कर्मयोगाचा अज्ञानाशी प्रत्यक्ष विरोध नसला तरी आत्मज्ञानाविषयी आवड निर्माण करून तो मोक्षाला साह्यभूत होतो. अविद्येच्या नाशाला ज्ञानच आवश्यक आहे. ज्ञानाच्या उत्पत्तीसाठी शम-दमादि संपत्तीच पाहिजे. अशा रीतीने प्रत्यक्ष नाही तरी परंपरेने कर्मयोगाचे अनुष्ठान मोक्षोपकारक ठरते. (*'रुचिद्वारोपकुर्वन्ति कर्माण्यात्मविमुक्तये। अज्ञानस्याविरोधित्वान्न साक्षादात्मबोधवत्। अविद्याया न चोच्छित्तौ ज्ञानादन्यदपेक्षते। ज्ञानोत्पत्तौ तु नैवान्यच्छमादिभ्यो ह्यपेक्षते। शमाद्युत्पत्तये नान्यद्बुद्धिशुद्धेरपेक्षते। बुद्धिशुद्धौ च नित्यादिकर्मभ्यो नान्यदिष्यते। पारम्पर्येण कर्मैवं ज्ञानायैवोपयुज्यते।।*)

कर्म हे अशा रीतीने साधन आहे ज्याचे साध्य ब्रह्मात्मज्ञान आहे असा ज्ञानकांड आणि कर्मकांड यांचा साध्यसाधनसंबंध विशद करण्यासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. गर्भाशयांत असलेली खेकडीची पिले आपल्या पायाच्या तीक्ष्ण टोकांनी आपल्याच मातेचे मृदुतर असे पोट फाडून बाहेर येतात. यावरून ज्याच्यापासून उत्पत्ती झाली त्याला तो मारीत नाही असा काही नियम नाही. जे ज्याच्या विरुद्ध ते त्याला घातकही असते. जशी भांड्याला चिकटलेली माती काढायलाही मातीचाच उपयोग होतो ना? त्याचप्रमाणे अविद्या आणि तिच्यापासून निर्माण झालेले, वरचेवर जन्माला घालणारे कर्म, दोन्हीही, माणसाने ईश्वरोपासना म्हणून, फलाची इच्छा न धरतां केलेल्या योग नावाच्या कर्माने नाश पावतात. अशा प्रकारे निष्काम कर्मयोगाचे आचरण न करणाऱ्यांना मात्र प्रत्यवाय नांवाचा दोष लागतो; (कृ.यजुः तैत्तिरीय संहिता १:५:२) मग ज्ञानाची तर वार्ताच नको! भगवद्गीतेतही यासाठीच कर्मयोगाचा पुरस्कार केला आहे. *'तस्माद्योगाय युज्यस्व', 'योगः कर्मसु कौशलम्।। २:५०।।'*, (म्हणून तू योगाचाच अभ्यास कर; तोच कर्मबंधनांतून सुटण्याचा उपाय आहे.) *'कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्त्वा पदं गच्छन्त्यनामयम्।।२:५१।।*.३.

**साधनावधि तत्कार्य-मुपात्तपरसाधनः । ततः संन्यस्य शमवान्भवेन्नैष्कर्म्यसिद्धिभाक् ।।४।।**
**प्रकृत्युत्थगुणैः कोऽपि जात्वकर्मा न तत्फले । सक्तोऽज्ञोऽसक्त इद्विद्वानस्येदं लोकसंग्रहे ।।५।।**

'तत् साधनावधि कार्यम्। उपात्त+पर+साधनः ततः संन्यस्य शमवान् नैष्कर्म्य+सिद्धि+भाक् भवेत्।४। 'कः अपि जातुं प्रकृति+उत्थ+गुणैः अकर्मा न। तत् फले अज्ञः सक्तः, ज्ञः विद्वान् असक्तः। अस्य इदं लोकसंग्रहे।'५।

(ज्ञानी पुरुष समबुद्धीने कर्मांच्या फलाचा त्याग करून जन्मबंधांपासून सुटून निर्विकार अशा परमपदाची प्राप्ती करून घेतात.)

**ज्ञानाची साधने अंगी बाणेपर्यंत कर्म करावे -** 'मागच्या अध्यायांतील टीकेत उद्धृत केलेल्या ईशोपनिषद्वाक्यानुसार (२) कर्म करीतच शंभर वर्षे जगण्याचा श्रुतीचा आदेश आहे. तशाच जिवंत असेपर्यंत अग्निहोत्र करावे अशा आशयाच्या श्रुती आहेत. मग आयुष्य सगळे कर्मानेच व्यापून गेल्यावर संन्यास घेऊन श्रवण करावे' या आदेशाचे अनुसरण करता येणार नाही. मग ज्ञान कसे होणार व मोक्षही कसा मिळणार? ह्या आशंकेच्या समाधानासाठी सिद्धमुनी सांगत आहेत. ते - कर्माचे निष्काम अनुष्ठान, शम, दम, तितिक्षा, श्रद्धा समाधान आणि उपरती ही ज्ञानाची प्रत्यक्ष साधने प्राप्त होईपर्यंत करीत राहावे. शमदमादि संपत्तीची जोड झाली की संन्यास घेऊन गीतेत सांगितलेल्या 'नैष्कर्म्यसिद्धी'ची प्राप्ती करून घ्यावी. (*'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति'।।१८:४९।।* इथे शमवान् ह्या शब्दाचा उपयोग, 'परसाधनांच्या प्राप्तीनंतर जसा कर्मत्याग केला तसा पुन्हां ज्ञानप्राप्तीनंतर शमदमादिक साधनांचा त्यागही करायचा का' या शंकेचे निरसन करण्यासाठी केला आहे. गीतेचेही असेच प्रतिपादन आहे. *'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते। योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते'।।६:३।।* शमदमादि ज्ञानसाधने जोवर अंगी बाणत नाहीत तोवर संन्यास हा पतनाचेच कारण होतो. 'कर्मही सोडले आणि ब्रह्मज्ञानही गंवसले नाही' असा हा उभयभ्रष्ट, अंत्यजाप्रमाणे त्याज्य आहे असे गरुडपुराणाचे (प्रेतखंड-धर्मकांडः ४९:६४) मत आहे. शमदमादि दैवी संपत्ती ज्याने कमावली त्याने कधीही - ब्रह्मचर्याश्रमांतून, गृहस्थाश्रमांतून वा वानप्रस्थाश्रमांतून संन्यास घ्यायला हरकत

नाही.

**अहं यथानुतिष्ठामि लोकस्तदनुगो भवेत् । नेदं साध्विति मत्वाऽजः कर्मयोगं जगौ प्रभुः ।।६।।**
**कर्मयोगमयं तस्य चेष्टितं शृणु सादरम् । यच्छ्रुत्वा भवसम्बन्धं छित्वा याति परं पदम् ।।७।।**

'यथा अहं अनुतिष्ठामि लोकः तत्+अनुगः भवेत्। इदं न साधु।' इति मत्वा अजः प्रभुः कर्मयोगं जगौ।६। तस्य कर्म+योग+मयं चेष्टितं सादरं शृणु, यत् श्रुत्वा भव+सम्बन्धं छित्वा परं पदं याति।७।

(*'यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्'*, जाबाल उ. ४). अन्यथा आजन्म निष्काम कर्मयोगाचे आचरण करावे. अशा प्रकारे पूर्वापर श्रुतींचा समन्वय होतो.४. कुणीही कसल्याही अवस्थेत अकर्मा होऊ शकत नाही; कारण तो प्रकृतीच्या गुणांनी विवश असतो. पण ज्ञानी पुरुषही कर्म करतांना दिसतात. त्या दोघांत काय भेद आहे? अज्ञ जन कर्माच्या फलाच्या आसक्तीने प्रेरित होऊन कर्म करतात; तर आत्मज्ञानी पुरुष फळाविषयी अनासक्त असतात. यावर असा आक्षेप येऊ शकतो की प्रयोजनाशिवाय अगदी मूर्ख प्राणीसुद्धा प्रवृत्त होत नाही. मग ज्ञानी पुरुष फलाच्या आसक्तीविना कसा कर्म करतो? या प्रश्नाचे उत्तर असे आहे की आत्मज्ञानी (विद्वान्) लोकसंग्रहासाठी कर्म आचरून दाखवितो.५.

'ज्ञान्यांचा विचार ठीक आहे, पण मग श्रीगुरूंना तसे करायची काय आवश्यकता?' तेच सांगतात, 'मी जसा आचार करीन त्याचेच अनुकरण लोक करतील. संन्यासधर्माला प्रतिकूल वर्तन - राजच्या भक्तीसाठी पालखीत बसणे इत्यादि केले तर इतरही लोक आपापल्या आश्रमाला निषिद्ध असे वागतील. असा संकर होणे हे कांही बरे नाही,' ह्या विचाराने श्रीगुरूंनी कर्मयोगाचा उपदेश केला आहे.६. त्या श्रीगुरूंची कर्मयोगाचा उजागर करणारी लीला श्रद्धापूर्वक ऐक; ही ऐकणारे संसाराचा संबंध छेदून परमपदाला पावतात.७.

**ब्रह्मध्रुग्यवनो राजा कश्चिद्धिंस्रोऽभवत्खलः । सदस्याहूय विप्रान्स स्वाग्रे वेदानपाठयत् ।।८।।**
**वेदान्पठन्ति ये सार्थास्तेभ्यो दास्ये धनं बहु । इत्याकर्ण्य तदुक्तं ये रैलुब्धास्ते तथाऽभजन् ।।९।।**
**श्रुत्वा खलोऽपि वेदार्थं द्विजाग्रे ब्राह्मणान्छ्रुतीः । अकुत्सयद्गवाशेन मिथ्याचारो मतोऽखिलः ।।१०।।**
**एवं सत्येकदा विप्रौ वैदिकावेत्य दुर्विधौ । मत्तौ तमूचतू राजन् वेदशास्त्रविदौ स्व इत् ।।११।।**

कश्चित् ब्रह्म+ध्रुक् खलः यवनः राजा अभवत्। सः विप्रान् सदसि आहूय स्व+अग्रे वेदान् अपाठयत्।८। ये वेदान् सार्थान् पठन्ति तेभ्यः बहु धनं दास्ये। इति आकर्ण्य ये रै+लुब्धाः ते तथा अभजन्।९। खलः अपि वेद+अर्थं श्रुत्वा, द्विज+अग्रे ब्राह्मणान्, श्रुतीः अकुत्सयत्। गवाशेन अखिलः मिथ्या+आचारः मतः।१०। एवं सति एकदां दुर्विधौ मत्तौ, वैदिकौ विप्रौ तम् एत्य ऊचतू, '(हे) राजन्, (आवां) वेद+शास्त्र+विदौ स्वः इत्।'११।

कुणी एक ब्राह्मणद्वेष्टा दुष्ट यवन जातीचा राजा त्या वेळी राज्य करीत होता. तो ब्राह्मणांना आपल्या दरबारात बोलावून आपल्यासमोर त्यांच्याकडून वेदांचे पठण करवीत असे.८. जे त्याच्यापुढे वेदांचे पठण करून अर्थही सांगत त्यांना तो भरपूर दक्षिणा देत असे. ही वार्ता ऐकून धनाचे लोभी असलेले ब्राह्मण त्याच्याकडे येत आणि वेदांचे सार्थ पठण करीत.९. तो दुष्टही वेदांचे अर्थ ऐकून, ब्राह्मणांपुढे सर्व वेदांची आणि यज्ञाचा शेष म्हणून मांस खाणाऱ्या ब्राह्मणांचीही निंदा करीत असे. सर्व मानवांचे देह मुखादि अवयवांनी सारखेच असतांना वर्णाश्रमाचे प्रतिपादन करणारा, दगडां-लाकडांसारख्या जड वस्तूंत, मूर्तीत आणि चित्रांत तसेच पिंपळादि झाडांतही दैवतांची कल्पना करणाऱ्या वैदिक धर्माच्या समग्र आचाराला तो गोभक्षक मिथ्या ठरवीत असे.१०. असा त्या राजाचा क्रम चालू असतां दोन आचारहीन आणि विद्येच्या मदाने उन्मत्त झालेले ब्राह्मण त्याच्याकडे आले आणि त्याला म्हणाले, 'राजेसाहेब! आम्ही चारही वेद आणि सहा शास्त्रांचे अध्ययन केलेले आहोत.११.

**अस्मत्तुल्यौ न कौ क्वापि त्वन्निघ्नाश्चेदिहानय । श्रुत्वेदं स्वाश्रितेभ्यो राट् शशंसोचुः खलं हि ते ।।१२।।**
**न यान्ति संमुखे केऽपि तयोस्तत्तौ समर्चय । राजाप्यानर्च तौ विप्रौ गजावारोह्य भूषितौ ।।१३।।**
**जैह्व्यौपस्थ्यसुखासक्ति-निदानेनेदृशी स्थितिः । वेदज्ञानामधःपात-शङ्कावर्जितचेतसाम् ।।१४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**विद्यापरिश्रमो वादं विना न सफलोऽस्ति नौ । तदाज्ञापय गच्छावो गां जेतुं विदुषो द्विजान् ।।१५।।**

कौ क्व अपि अस्मत्+तुल्यौ न । त्वत्+निघ्नाः चेत् इह आनय। इदं श्रुत्वा राट् स्व+आश्रितेभ्यः शशंस। ते हि खलं ऊचुः।१२। के अपि तयोः संमुखे न यान्ति। तत् तौ समर्चय। राजा अपि तौ विप्रौ गजौ आरुह्य भूषितौ आनर्च।१३। जैह्व्य+औपस्थ्य+सुख+आसक्ति+निदानेन अधःपात+शंका+वर्जित+चेतसां ईदृशी स्थितिः।१४। विप्रौ उचतुः। 'नौ विद्या+परिश्रमः वादं विना न सफलः। तत् विदुषः द्विजान् जेतुं गां गच्छावः। आज्ञापय।'१५।

'संपूर्ण भूमंडलावर आमच्यासारखे विद्वान् ब्राह्मण कुठेच नाहीत. तुझ्या पदरी असतील तर त्याना आमच्यासमोर वादासाठी आण!' ही त्यांची प्रौढी ऐकून राजाने आपल्या दरबारांतील ब्राह्मणांना विचारले. ते त्या दुष्टाला म्हणाले.१२. 'त्यांच्यासमोर कुणीही वादाला उभेही राहणार नाहीत. तेव्हां त्यांचाच आपण सत्कार करावा.' राजाने त्याप्रमाणे त्या ब्राह्मणद्वयांचा हत्तीवर बसवून, वस्त्रे भूषणे देऊन आदरसत्कार केला.१३.

रसना आणि लिंग यांच्या सुखांच्या आसक्तीने धनाच्याच मागे लागून वेदविक्रयादि दुष्कर्मे करतांना, वेदांचे अध्ययन करूनही, अधःपाताची शंकाही ज्याच्या मनाला शिवत नाही; 'काय तो हाच लोक आहे, परलोक म्हणून कांही नाहीच' असे मानणाऱ्या नास्तिकांची अशी स्थिती होते. यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाप्रमाणे (कठ उ. १:२:६) ते पुनः पुन्हां मृत्यूलाच वश होत राहतात. १४. ते ब्राह्मण राजाला म्हणाले, 'आम्ही कष्टाने संपादन केलेल्या वेदविद्येचे साफल्य वादाविना होणार नाही. तरी सर्व पृथ्वीवर पर्यटण करून विद्वान ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हाला आज्ञा द्या.'१५.

**स तथाप्यादिशद्विप्र-पराभवपरो नृपः । जयपत्रं द्विजान्जित्वा गृह्णन्तौ चेरतुर्भुवम् ।।१६।।**
**वावदूकतया मिथ्या द्विजांस्तर्जयतोः सदा । विवादं त्याजितैः प्राज्ञैर्जयोऽभूद्विशदस्तयोः ।।१७।।**
**त्रिविक्रमं त्रयीज्ञं तौ श्रुत्वागत्योचतुः कुरु । चेद्वेदज्ञोऽसि वादं नौ देहि वा जयपत्रमित् ।।१८।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**वेदज्ञास्त्वादृशाः पूज्या द्विजौ नाहं तथाविधः । यतौ जयाजयसमे जिते किं वां भवेदिह ।।१९।।**

सः विप्र+पराभव+परः नृपः तथा आदिशत्। द्विजान् जित्वा जयपत्रं गृहणन्तौ भुवं चेरतुः।१६। प्राज्ञैः सदा विवादं त्याजितैः मिथ्या वावदूकतया द्विजान् तर्जयतोः, तयोः विशदः जयः अभूत्।१७। त्रिविक्रमं त्रयीज्ञं श्रुत्वा तौ (तं) आगत्य ऊचुः। 'चेत् वेदज्ञः असि वादं कुरु जयपत्रं इत् वा नौ देही।'१८। त्रिविक्रम उवाच। '(हे) द्विजौ, त्वादृशाः वेदज्ञाः पूज्याः। अहं न तथाविधः। जय+अजय+समे यतौ जिते वां इह किं भवेत्?'१९।

विप्रांचा पराभव करून वैदिक धर्माचा अधिक्षेप करण्यासाठी उत्सुक असलेल्या त्या राजाने त्या ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणे आज्ञापत्र दिले. तेही ब्राह्मणांशी वादविवाद करून त्यांना जिंकून जयपत्र घेत भूमीवर संचार करू लागले.१६. खरे विद्वान् कधीही वादविवाद करीत नसल्याने, वितंडवादाने आणि लटक्या युक्तिवादाने इतर ब्राह्मणांचा अधिक्षेप करण्याने त्या दोघांचा जिकडेतिकडे विजय होऊ लागला.१७. त्रिविक्रम यति हे तीनही वेदांचे जाणते आहेत अशी त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्याकडे जाऊन त्यांनी त्यांना वादाचे आह्वान दिले. म्हणाले, 'आमच्याशी वाद कर अथवा आम्हांला जयपत्र तरी दे!'१८. त्रिविक्रम म्हणाले, 'ब्राह्मण हो! आपल्यासारखे वेदांचे ज्ञानी सन्माननीय आहेत. मी त्यापैकी नाही.' इथे त्या ब्राह्मणांना **वेदज्ञ** असे संबोधन उपहासगर्भ आहे. मनुस्मृतीच्या वचनानुसार (६:८२) अध्यात्माच्या ज्ञानावांचून वेदांचे तत्त्व जाणतां येत नाही किंवा वैदिक कर्मांचे इष्ट फलही प्राप्त होत नाही. अध्यात्माचा गंधही नसणारे हे ब्राह्मण वेदज्ञ होऊंच शकत नाहीत. पुढे त्रिविक्रम भारती त्या ब्राह्मणांना म्हणाले, 'आम्हां संन्याशांना जय आणि पराजय दोन्ही सारखेच. तेव्हां अशा संन्याशाकडून जयपत्र घेण्यांत तुम्हांला काय हशील?'१९.

**पश्येमान्यमितानि त्वं पत्रं देहीति भाषितः । ताभ्यां दास्ये गुरोरग्र इत्युक्त्वा श्रीगुरुं ययौ ।।२०।।**
**तौ मत्तौ स्वासनारूढौ मूढौ तमनुजग्मतुः । मठे श्रीगुरुमासाद्य तमस्तौषीत् त्रिविक्रमः ।।२१।।**
**नम ॐकाररूपाय निर्गुणाय गुणात्मने । जगद्गुरो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत ।।२२।।**
**नाज्ञानान्धः परं वेत्ति यं घूक इव भास्करम् । स त्वं भो मत्तविप्रद्विड्-द्विजौ शासितुमर्हसि ।।२३।।**

'पश्य, इमानि अमितानि (जयपत्रानि), त्वं पत्रं देहि', इति भाषितः (त्रिविक्रमः), 'ताभ्यां गुरोः अग्रे दास्यामि', इति उक्त्वा श्रीगुरुं ययौ।२०। तौ मत्तौ स्व+आसन+आरूढौ मूढौ तं अनुजग्मतुः। त्रिविक्रमः मठे श्रीगुरुं आसाद्य तं अस्तौषीत्।२१। 'नम ॐकार+रूपाय निर्गुणाय गुणात्मने, पर+आनन्द+मूर्ते नमः। हे जगद्गुरो, अच्युत, जय, जय।२२। यं परं अज्ञान+अंधः, घूक इव भास्करं न वेत्ति, सः त्वं भो मत्त+विप्र+द्विट्+द्विजौ शासितुं अर्हसि।'२३।

'ही पहा असंख्य जयपत्रे आम्ही मिळवली आहेत; तूं पण तसेच पत्र लिहून दे!', असा त्यांचा आग्रह पाहून, 'बरे तर, गुरूंच्या समोर देतो', असे बोलून त्रिविक्रम त्यांना घेऊन गाणगापूरला श्रीगुरूंच्याकडे गेला.२०. ते मदांध ब्राह्मण आपापल्या पालख्यांत बसून त्रिविक्रमाच्या मागे गेले. ह्या अशिष्ट वर्तनांतून त्यांनी आपले मूर्खत्वच प्रकट केले. त्रिविक्रमाने गाणगापूरच्या मठांत येऊन श्रीगुरूंना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. २१. 'भगवंता, मायेच्या तीन गुणांनी नटलेल्या या प्रपंचाचा आपल्याशी कांही एक संबंध नाही; आपण आपल्या स्वाभाविक आनंदांतच निमग्न आहांत; द्वैत वा अद्वैत या दोन्हींच्या पलीकडे आपण आहांत; काल, देश आणि वस्तू यांनी परिच्छिन्न नाहीत; स्वगत, सजातीय आणि विजातीय हे भेदही आपल्यांत नाहीत; निन्दा आणि स्तुती आपल्याला सारखीच आहेत; शत्रू आणि मित्र यांना एकरूपच आहांत; आपल्या सर्व इंद्रियांतून प्रसन्नता ओसंडते आहे; मुखावर स्मितहास्य विलसत आहे; निश्चिंत आणि कृतार्थ असे आपण सच्चिदानंदब्रह्मांत स्थिरावलेले आहांत; म्हणजेच आपण ॐकारस्वरूप आहांत. आपल्याला नमस्कार असो!'२२.

**स्तुत्वैवमादितः सर्वं शशंसागमकारणम् । तौ प्राह गुरुरप्याप्तौ साध्यमेतेन किं द्विजौ ।।२४।।**

**।। विप्रावूचतुः ।।**

**राज्ञाज्ञप्तौ द्विजान्जेतुमावां विद्वत्तमौ भुवि । अत्रानीतावनेनोभौ भिक्षू किं वेदपारगौ ।।२५।।**

एवं स्तुत्वा सर्वं आगम+कारणं आदितः शशंस। गुरुः अपि तौ आप्तौ प्राह, 'द्विजौ, एतेन किं साध्यम्?'२४। विप्रौ ऊचतुः, 'राज्ञा आवां भुवि विद्वत्+तमौ द्विजान् जेतुं आज्ञप्तौ। अनेन (त्रिविक्रमेण) उभौ अत्र आनीतौ। (युवां) भिक्षू वेद+पारगौ किम्?' २५।

'तर तूं सगुणाला वंदन करतोस कां?' हा प्रश्न अपेक्षून निर्गुणाला नमस्कार केला आहे. 'मग असा निर्गुण मी शब्दाना कसा गंवसेन?' या प्रश्नाच्या उत्तरी, 'भक्तांवर कृपा करण्यासाठी सगुणरूप धारण केलेल्या आपणांस नमस्कार असो. या अवतारविग्रहांतही आपले सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व आणि सर्वशक्तित्व अस्खलित आहे म्हणून हे अच्युता, सर्व जगाच्या गुरो, निरुपाधिक, निरतिशय आनंद हीच आपली मूर्ती आहे; आमच्या मूर्तीसारखी प्रारब्धकर्मापासून झालेली नाही. भक्तांची मायेच्या आवरणशक्तीपासून सुटका करून विजयी हो, विजयी हो!' एवढे श्रीगुरूंचे सामर्थ्य आहे हे **अच्युत** या संबोधनांतून सूचित केले आहे. 'एवढा मी महान् असूनही लोक मला कसे ओळखत नाहीत?' हा प्रश्न अपेक्षून त्रिविक्रम सांगतात, अज्ञानाने आंधळे झालेले लोक, दिवांधाने सूर्याला पाहूं नये तसे परम ज्योतिस्वरूप ज्ञानप्रदीप आपणांस जाणत नाहीत.'. यावर श्रीगुरूंनी 'तें असूं दे आत्तां तुझ्या येण्याचे काय प्रयोजन आहे?' असे विचारल्यावर त्रिविक्रम म्हणतात, 'हे विद्येच्या मदाने मस्त होऊन गावोगांव ब्राह्मणांचा अधिक्षेप करणारे - त्यांचा द्वेष करणारे, दोघे ब्राह्मण आले आहेत. त्यांना आपणच शासन करूं शकतां.'२३. अशा प्रकारे स्तुती करून त्रिविक्रमाने आपल्या येण्याचे कारण सविस्तर निवेदन केले. तेव्हां श्रीगुरू त्या तिथे आलेल्या दोघा ब्राह्मणांना म्हणाले, 'ह्या व्यर्थ ब्रह्मद्वेषाने तुम्ही काय साधणार आहांत?'२४. ते ब्राह्मण म्हणाले, 'आम्ही सर्वश्रेष्ठ विद्वान् असून पृथ्वीवरील सर्व ब्राह्मणांना जिंकण्याची आम्हांला राजाने आज्ञा केली आहे. ह्या त्रिविक्रमाला आम्ही जयपत्र मागितले असतां तो आम्हांला इथे घेऊन आला आहे. तुम्ही दोघे संन्यासी काय वेद जाणाल?'२५.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**गर्वेणैव प्रणष्टाः स्यू राक्षसा असुरा द्विजौ । अनादीन्कृत्स्नशोऽनन्तान्कोऽपि वेदान्न वेद रे ।।२६।।**
**ब्रह्मचर्याश्रमे वेदान्पठितुं प्राक्तपोऽतपत् । भरद्वाजो विधिः प्रीतस्तस्मै वेदानदर्शयत् ।।२७।।**
**दृष्ट्वा भास्वद्वेदराशीन् शङ्कितोऽभूदृषिर्ददौ । त्रीन्मुष्टीनृषयेऽद्यापि पठ्यमानो न पारगः ।।२८।।**

श्रीगुरुः उवाच। (हे) द्विजौ, असुरा, राक्षसा गर्वेण एव प्रणष्टा स्यू। अनादीन् अनन्तान् वेदान् कृत्स्नशः कः अपि न वेद, रे!२६। प्राक् भरद्वाजः ब्रह्मचर्य+आश्रमे वेदान् पठितुं तपः अतपत्। प्रीतः विधिः तस्मै वेदान् अदर्शयत्।२७। भास्वत् वेदराशीन् दृष्ट्वा ऋषिः शंकितः अभूत्। (ब्रह्मा) ऋषये त्रीन् मुष्टीन् ददौ। (सः) अद्य अपि पठ्यमानः, न पारगः।२८।

श्रीगुरूंनी त्या ब्राह्मणांची गर्वोक्ति ऐकून त्यांना समजाविले की, 'अरे ब्राह्मणांनो, बली, बाण इत्यादि असुर तसेच रावणादि राक्षस हे गर्वानेच नष्ट झाले! अपौरुषेय - म्हणजे कुणाही व्यक्तीने न रचलेले म्हणून अनादि असलेले आणि अनंत असलेले वेद पूर्णतः कुणीच जाणले नाहीत.' इथे कुणी बृहस्पतींच्या वचनानुसार वेदांचे कर्ते सगळे मुनि, भाण्ड, निशाचर होते (सर्वदर्शनसंग्रह - चार्वाकदर्शनपरिचय) असे म्हणतील तर ते मत शास्त्रविरुद्ध आहे. बृहदारण्यक उपनिषदानुसार (२:४:१०) ऋक्, साम, यजुः व अथर्व वेद हे परब्रह्माची निःश्वसिते (उछ्वास) आहेत. कृ. यजुर्वेदांत (३:८:११:४) वेद अनंत असल्याचे प्रतिपादन आहे.२६. पूर्वी भरद्वाज ऋषींनी वेद शिकण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमांत तप केले. ब्रह्मदेवांनी प्रसन्न होऊन त्यांना सर्व वेदांचे दर्शन घडविले.२७. वेदांच्या त्या तेजस्वी पर्वतप्राय राशींकडे पाहून भरद्वाजाच्या मनांत 'आपल्याकडून इतके सर्व वेदांचे अध्ययन कसे पार पडेल?' अशी शंका आली. तेव्हां ब्रह्मदेवांनी त्याला त्या वेदांच्या राशींतील आपल्या हाताने केवळ तीन मुठी काढून पुस्तकरूपाने दिल्या. आजवर भरद्वाज मुनि त्यांचे पठण करीत आहेत; पण त्यांचाही अभ्यास पूर्ण झालेला नाही.२८.

**पैलो वैशम्पायनश्च जैमिनिश्च सुमन्तुकः । ऋग्यजुःसामाथर्वाख्या अशिक्षन्त श्रुतीः क्रमात् ॥२९॥**
**गुरुर्व्यासो हरिः साक्षात्ततोऽत्र प्रसृता श्रुतिः । पठिताः कतिचिद्वेदा आयुष्मद्भिर्युगान्तरे ॥३०॥**
**शाखयैवाल्पायुषोऽत्र मन्दा वेदज्ञमानिनः । प्रतिग्रहपरान्नस्त्री-सक्ताः सिद्धिविवर्जिताः ॥३१॥**
**व्यासेनोक्ताश्चतुर्वेदाः शाखाङ्गोपाङ्गसंयुताः । आयुर्वेदस्ततो रुग्हृदृग्वेदस्योपवेद उत् ॥३२॥**
**स्वर्णोऽत्रिगोत्रजो गायत्रच्छन्दो ब्राह्मदैवतः । द्व्यरत्निमात्रो दीर्घाक्ष ऋग्वेदो व्यक्तकन्धरः ॥३३॥**

पैलः, वैशयम्पायनः च जैमिनिः च सुमन्तुकः क्रमात् ऋक्+यजुः+साम+अथर्व+आख्या श्रुतीः अशिक्षन्तः।२९। गुरुः व्यासः साक्षात् हरिः। ततः अत्र श्रुतिः प्रसृता। युगान्तरे आयुः+मत्+भिः कतिचित् वेदाः पठिताः।३०। 'अत्र मन्दा अल्पायुषः शाखया एव वेदज्ञमानिनः प्रतिग्रह+पर+अन्न+स्त्री+सक्ताः सिद्धि+विवर्जिताः।'३१। व्यासेन शाखा+अङ्ग+उपाङ्ग+संयुताः चतुः वेदाः उक्ताः। रुक्+हृत् आयुर्वेदः ऋग्वेदस्य उत् उपवेद ततः ।३२। ऋग्वेदः सु+अर्णः अत्रि+गोत्रजः, गायत्र+छन्दः, ब्राह्म+दैवतः, द्वि+अरत्नि+मात्रः, दीर्घाक्षः, व्यक्त+कंधरः।३३।

पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमन्तु ह्या चार शिष्यांनी अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद ह्या चार श्रुतींचे शिक्षण घेतले.२९. त्यांचे गुरू व्यासमुनि हे साक्षात् विष्णूचा अवतार होते. ह्या काळांत (कलियुगांत) त्यांच्यापासूनच वेदांचा प्रसार झाला. कृतादि पूर्वीच्या युगी दीर्घयुषी मुनींनी कांही कांही वेदांचे अध्ययन केले.३०. 'ह्या कलियुगांत मात्र अल्पायुषी, अल्पबुद्धी ब्राह्मण एखाद्या शाखेच्या अध्ययनानेच स्वतःला वेदज्ञ मानतात. तसेच प्रतिग्रह (दान घेणे) परान्न आणि परस्त्री यांच्या ठिकाणी आसक्त असतात. त्यामुळे ते वेदमंत्रांच्या सिद्धीपासून वंचितच राहतात.'३१. आश्वलायनादि शाखा, शिक्षा, कल्प, छंद, व्याकरण, निरुक्त आणि ज्योतिष ही अंगे तसेच सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा आणि वेदांत ही उपांगे यांच्यासहित व्यासांनी चार वेदांचे निरूपण केले आहे.

**ऋग्वेद -** त्यांत पहिला ऋग्वेद. रोगनाशक आयुर्वेद हा त्याचा उत्कृष्ट उपवेद विस्तारलेला आहे.३२. हा ऋग्वेद सुंदर अक्षरांचा, किंवा सुवर्णाच्या रंगाचा; अत्रिगोत्रोत्पन्न; गायत्र्यादि छंदांनी सुबद्ध आहे. ह्याचे **दैवत** ब्रह्मा आहे. ह्याच्या ध्यानाची दोन हात उंच, विशाल नेत्रांची आणि रुंद खांद्याची आहे.३३.

**शाकला बाष्कला तस्याः सांख्यायन्याश्वलायनि । माण्डूक्येत्थं पञ्च शाखा अष्टौ विकृतयस्त्वृचः ।।३४।।**
**निरुक्तं व्याकृतिर्ज्योतिश्छन्दः शिक्षा च कल्पकः । अस्येमानि षडङ्गानि वेत्तीमं कोऽद्य कृत्स्नशः ।।३५।।**
**पञ्चारत्निमितोऽर्काभः कपाली कृशदीर्घकः । यजुर्वेदो धनुर्वेदः क्षत्रेष्टोऽस्योपवेद उत् ।।३६।।**
**त्रिष्टुप्छन्दो भरद्वाज-गोत्रजो विष्णुदैवतः । षडशीतिभिदोऽङ्गानि प्राग्वदाष्टादशास्य तु ।।३७।।**
**परिशिष्टान्युपाङ्गानि षडेवैष इयान् ततः । क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी तृतीयकः ।।३८।।**

तस्यः शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि मांडूक्य इत्थं पञ्च शाखा। ऋचः अष्टौ विकृतयः।३४। अस्य निरुक्तं, व्याकृतिः, ज्योतिः, छंदः, शिक्षा च कल्पकः इमानि षड्+अङ्गानि। अद्य इमं कृत्स्नशः कः वेत्ति?३५। यजुर्वेदः पञ्च+अरत्नि+मितः अर्काभः कृश+दीर्घकः। उत क्षत्र+इष्टः धनुर्वेदः अस्य उपवेदः।३६। त्रिष्टुप्+छंदः भरद्वाज+गोत्रजः विष्णुदैवतः षड्+अशीति+भिदः, अस्य अङ्गानि पूर्ववत्, तु अष्टादश (परिशिष्टानि),।३७। उपाङ्गानि षट् एव। इयान् (यजुर्वेदः) ततः। तृतीयकः क्षमी दान्तः शुचिः स्रग्वी चर्मी दण्डी।३८।

ऋग्वेदाच्या शाकला, बाष्कला, सांख्यायनि, आश्वलायनि आणि मांडूक्य अशा पांच **शाखा** आहेत; आणि जटा, माला, शिखा, लेखा, ध्वज, दण्ड, रथ, घन अशा आठ **विकृती** आहेत.३४. निरुक्ती, व्याकरण, ज्योतिष्, छंद, कल्प आणि शिक्षा ही या ऋग्वेदाची सहा **अंगे** आहेत. आजच्या काळांत ह्याला पूर्णपणे कोण जाणतो? अर्थात् कुणीही नाही.३५.

**यजुर्वेद -** आतां यजुर्वेदाविषयी सांगतात. हा पांच हात उंचीचा, सूर्यसंकाश, कृश आणि उंच आहे. तसेच क्षत्रियांना प्रिय असलेला धनुर्वेद याचा **उपवेद** आहे.३६. ह्याचा त्रिष्टुप् **छंद** आहे, **गोत्र** भरद्वाज आहे आणि **दैवत** विष्णु आहे. ह्याचे शाऐंशी **भेद** असून ह्याला अठरा **परिशिष्टे** आहेत.३७. याचीही उ**पांगे** सहाच आहेत. असा ह्या यजुर्वेदाचा विस्तार आहे.३८.

**षडरत्निमितोऽस्योप-वेदो गान्धर्वसंज्ञकः । रुद्राधिदेवो जगतीच्छन्दः काश्यपगोत्रजः ।।३९।।**
**हता नष्टाश्चापि शिष्टा नवाष्टौ च भिदोऽस्य तु । सामाङ्गोपाङ्गभेदेन कः पुमान्वेदितुं क्षमः ।।४०।।**
**चण्डस्तीक्ष्णोऽसितः काम-रूपी क्षुद्रक्रियोऽशुभः । स्वदारातुष्टोऽथर्वाख्यः शस्त्रास्त्रोपाङ्गवेद उत् ।।४१।।**

षड+अरत्नि+मितः। अस्य उपवेदः गान्धर्वसंज्ञकः। अधिदेवः रुद्रः। जगती छन्दः काश्यपगोत्रजः।३९। अस्य तु भिदः हता नष्टाः च अपि तु नव+अष्टौ शिष्टाः। साम अङ्ग+उपाङ्ग+भेदेन वेदितुं पुमान् क्षमः किम्?४०। अथर्वाख्यः चण्डः, तीक्ष्णः, असितः, कामरूपी, क्षुद्रक्रियः अशुभः स्व+दारा+तुष्टः शस्त्रास्त्र+उपाङ्ग+वेदः।४१।

**सामवेद -** तिसरा सामवेद क्षमाशील, निग्रही, शुचि, नित्य हार घालणारा, ढाल व काठी घेतलेला, सहा हात उंच आहे. याचा **उपवेद** गांधर्ववेद (संगीत) आहे. सामवेदाची **देवता** रुद्र, **छंद** जगती आणि **गोत्र** काश्यप आहे.३९. ह्याचा सहस्रावधी शाखांतून कित्येक इंद्राने चोरल्या तर कांही कालौघांत नाश पावल्या. तरीही आसुरायणी, वार्तान्तवेया, वासुरायणी, प्राञ्जली, ऋग्वेनविधा, प्राचीनयोग्या, ज्ञानयोग्या आणि राणायनी आठ शाखा शेष आहेत. त्यांतील राणायनीच्या आणखी नऊ शाखा आहेत. त्या अशा - राणायनीया, शाट्यायनीया, शाट्या, मुद्गला, खल्वला, महाखल्वला, लाङ्गला, कौथुमा, गौतमा आणि जैमिनीया.४०.

**अथर्ववेद -** चौथा अथर्व नांवाचा वेद चण्ड व तीक्ष्ण (अभिचारादि प्रयोगांचा प्रवर्तक), इच्छेला येईल ते रूप धारण करणारा, वशीकरणादि ऐहिक फल देणाऱ्या क्षुद्र क्रियांचा प्रवर्तक आणि स्वपत्नीत संतुष्ट आहे. अभिचार आणि वशीकरणादि प्रयोगांमुळे हा पतनाला कारण होतो म्हणून याला अशुभ म्हटले असले तरी ईश्वरप्रीतीसाठी ह्याचे सेवन केले तर तो शुभद मोक्षदायी होतो. किंवा याची उपनिषदे प्रश्न, मुंडक आणि मांडूक्य ही मोक्षप्रद आहेत आणि मोक्षानंतर शुभ राहत नाही असा अशुभ. याला तैत्तिराय उपनिषदांत पुच्छाबरोबरच प्रतिष्ठा असेही म्हटले आहे.४१.

**बैजानगोत्रजोऽनुष्टुप्छन्दा एषैन्द्रदैवतः । नवास्य भेदाः संपूर्णाः कल्पाः पञ्चात्र वेत्ति कः ।।४२।।**
**वर्षेऽद्य भारते कर्म-भ्रष्टा हीना द्विजातयः । वेदान्क्रीणन्त्यन्त्यजाग्रे सत्त्वहीना अतोऽभवन् ।।४३।।**
**उत्सृष्टोपाकृताभ्यस्त-गुप्तवेदमनुर्भुविः । किं न दास्यति विप्रेभ्यः प्रत्येकः कामधेनुवत् ।।४४।।**
**देवाधीनं जगन्मन्त्र-निघ्ना देवास्तु मन्त्रकाः । ब्रह्माधीना ब्राह्मणा मे देवता विष्णुरब्रवीत् ।।४५।।**

एष बैजानगोत्रजः, अनुष्टुप्+छन्दा, ऐन्द्र+दैवतः। अस्य भेदा नवा, कल्पाः पञ्च, कः संपूर्णाः वेत्ति?४२। अद्य भारते वर्षे कर्मभ्रष्टा हीना द्विजातयः अन्त्यज+अग्रे वेदान् क्रीणन्ति अतः सत्त्व+हीना अभवन्।४३। देवाधीनं जगत्, देवाः तु मंत्र+निघ्नाः, मन्त्रकाः ब्रह्म+अधीना, ब्राह्मणा मे देवता विष्णुः अब्रवीत्।४४। उत्सृष्ट+उपाकृत+अभ्यस्त+गुप्त+ वेद+मनुः प्रत्येकः विप्रेभ्यः भुवि कामधेनुवत् किं न दास्यति?४५।

हा अथर्ववेद **बैजानगोत्री** आहे; याचा **छंद** अनुष्टुप् आहे; आणि **देवता** इन्द्र आहे. याच्या पैप्पला, प्रथमा, दांता, प्रदांता, आख्याता, स्तौता, ख्याता, ब्रह्मदावला आणि शौनकेया अशा नऊ **शाखा** असून याला विधान, नक्षत्र, संहिता, शांती आणि विधिविधान असे पांच **कल्प** आहेत. या सर्वांचे संपूर्ण ज्ञान कुणाला बरे होऊं शकेल?४२.

आज ह्या भरतवर्षांत ब्राह्मणांनी आचार सोडल्यामुळे ते हीन झाले आहेत; अंत्यजांपुढे वेदाचा विक्रय करतात आणि त्यामुळे त्यांचे मंत्रसामर्थ्य लुप्त झाले आहे. ते केवळ मंत्राचे अक्षरधारी झाले आहेत.४३. शिक्षा या वेदांगाला अनुसरून (*'सुतीर्थादागतं व्यक्तं स्वाम्नाय्यं सुव्यवस्थितम्। सुस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते।।'* पाणिनीय शिक्षा ५१) मौखिक परंपरेने शिकलेला, उत्सर्जन आणि उपाक्रमाने टिकविलेला आणि भोजनादि नियमपालनाने आणि स्त्रीशूद्रादिकांच्या संपर्कापासून राखलेला एकेक वेदमंत्रसुद्धा ब्राह्मणाला काय देऊं शकणार नाही? सर्व कांही देईल. या भूमीवर तो कामधेनूसमानच आहे. एका मंत्राचे हे सामर्थ्य आहे. मग संपूर्ण वेदाचे सामर्थ्य केवढे असेल?४४. जग देवतांच्या अधिष्ठानावर टिकून आहे. ऋग्वेदाच्या प्रतिपादनानुसार (१:४०:५) देवता मंत्रामध्ये अवस्थित आहेत. त्या मंत्रांच्या उच्चाराचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे. ते ब्राह्मण माझे दैवत आहेत असे साक्षात् विष्णू म्हणाले आहेत.४५.

**सर्वस्वदक्षिणा भूपैर्दत्तापि ब्राह्मणैः पुरा । नात्ता कृतोऽद्रिस्तृणवत् सुसत्त्वाच्चाद्रिवत्तृणम् ।।४६।।**
**वशसर्वामरास्तेऽपि तदा स्वल्पज्ञमानिनः । युवां भ्रष्टौ भ्रष्टमन्त्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ ।।४७।।**
**आत्मस्तुतिपरौ ब्रह्म-द्विषौ साध्वात्मवञ्चकौ । त्वत्तुल्या ये पुरा जाता जातास्ते ब्रह्मराक्षसाः ।।४८।।**

'पुरा भूपैः सर्वस्व+दक्षिणा दत्ता अपि ब्राह्मणैः न अत्ता। सुसत्त्वात् अद्रिवत् तृणं, अद्रिः तृणवत्, च कृतः।४६। तदा वश+सर्व+अमरा अपि ते स्वल्पज्ञ+मानिनः। युवां भ्रष्टौ, भ्रष्ट+मंत्रौ स्वल्पज्ञौ प्राज्ञमानिनौ।४७। आत्म+स्तुति+परौ, ब्रह्म+द्विषौ साधु+आत्म+वंचकौ। पुरा ये त्वत्+तुल्या जाता ते ब्रह्मराक्षसाः जाताः।'४८।

'पूर्वीच्या काळी राजे-महाराजांनी सर्वस्वाचीही दक्षिणा देऊ केली असता ती ब्राह्मणांनी स्वीकारली नाही. कारण प्रतिग्रह हा तपाच्या तेजाचा नाशक असतो. त्यामुळे त्यांच्या मंत्रांत उत्कृष्ट सामर्थ्य होते. त्यामुळे ते गवताच्या काडीचाही पर्वत करीत तर पर्वताला कस्पटासमान करीत.'४६. तैत्तिरीय आरण्यकांत (२:१५) सांगितल्याप्रमाणे अशा त्या वेदवित् ब्राह्मणांच्या ठिकाणी जेवढ्या कांही देवता आहेत त्या वास करतात. असे सर्व देवतांवर प्रभुत्व असलेले ते ब्राह्मणसुद्धां स्वतःला स्वल्पज्ञच मानीत असत. त्यांना कसलाही गर्व किंवा मत्सर नव्हता. त्या गर्विष्ठ ब्राह्मणांना श्रीगुरू म्हणतात, 'तुम्ही मात्र आचारभ्रष्ट, जातिभ्रष्ट आणि मंत्रभ्रष्ट असून थोडक्याच वेदाभ्यासाने स्वतःला विद्वान् समजता. आपली आपणच स्तुती करता, आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठी ब्राह्मणांचा द्रोह करता आणि आपल्या सरलस्वभावी आत्म्याचीही वंचना करता! पूर्वी जे तुमच्यासारखे झाले त्यांना ब्रह्मराक्षसाच्या योनीत जावे लागले.'४७-४८.

॥ विप्रावूचतुः ॥

**नैतावच्छ्रोतुमाप्तौ स्वो विवादं कुरु चेन्न वाम् । तच्छक्तिर्जयपत्रं नौ युवाभ्यां दीयतामिति ॥४९॥**
**तथेत्युक्त्वोद्वीक्ष्य यान्तमानयित्वान्त्यजं प्रभुः । लेखा उल्लिख्य सप्ताभ्युत्क्रामयन्तमवाचयत् ॥५०॥**
**प्राचीनसप्तजन्मज्ञो रेखास्पर्शनतोऽभवत् । आद्यां गत्वास्मि बुरडो मातंग इति भाषितम् ॥५१॥**
**द्वितीयां तु किरातोत्थो रावणाख्य इतीरितम् । तृतीयां च नदीतीरस्थो गाङ्गेय इतीरितम् ॥५२॥**

विप्रौ ऊचतुः। 'एतावत् श्रोतुं न आप्तौ स्वः। विवादं कुरु। वां तत्+शक्तिः न चेत् युवाभ्यां नौ जयपत्रम दीयताम्।' इति।४९। प्रभुः 'तथा' इति उक्त्वा यान्तं अन्त्यजं आनयित्वा, सप्ता लेखा उल्लिख्य उत्क्रामयन्तम् अवाचयत्।५०। रेखा+स्पर्शनतः (सः) प्राचीन+सप्त+जन्म+ज्ञः अभवत्। आद्यां गत्वा 'मातंगः बुरुडः अस्मि' इति भाषितम्।५१। द्वितीयां तु 'किरातोत्थः रावणाख्यः' इति ईरितम्। तृतीयां च 'नदी+तीरस्थः गाङ्गेयः' इति ईरितम्।५२।

यावर ते ब्राह्मण म्हणाले, 'हे सगळे ऐकून घ्यायला आम्ही इथे आलो नाही. तुमच्यांत सामर्थ्य असेल तर आमच्याशी वाद करा. अन्यथा तुम्ही दोघे आम्हांला जयपत्र लिहून द्या.'४९. श्रीगुरूंनी 'ठीक तर,' असे म्हणून वाटेवरून जाणाऱ्या एका अंत्यजाला बोलावून घेतले. त्याच्यासमोर जमिनीवर सात रेघा काढून त्याला एकेक रेघ ओलांडायला लावली. प्रत्येक रेघ ओलांडून त्याला त्याची ओळख विचारली.५०. क्रमशः त्या रेघांना स्पर्श करताच त्याला त्या त्या पूर्वजन्माचे ज्ञान झाले. अशा रीतीने सध्याचा जन्म धरून त्याला सात जन्मांचे स्मरण झाले. पहिल्या रेघेवर येतांच तो 'मी मांग असून बुरुडाचा व्यवसाय करतो' असे म्हणाला.५१. दुसऱ्या रेघेशी येतांच तो 'आपण भिल्ल जातीचे असून आपले नांव रावण' असे सांगू लागला. तिसऱ्या रेघेवर तो स्वतःला 'नदीकाठचा कोळी' असल्याचे बोलू लागला.५२.

**चतुर्थीं वै कृषिपटुः शूद्रोऽस्मीत्यभिभाषितम् । पञ्चमीं सोमदत्ताख्यो वैश्योऽस्मीत्युदितं ततः ।।५३।।**
**षष्ठीं गोवर्धनाख्योऽहं क्षत्रः शूर इतीरितम् । सप्तमीं वेदशास्त्रज्ञो ब्राह्मणोऽस्मीति भाषितम् ।।५४।।**
**तदास्य मन्त्रितं भस्म क्षिप्त्वाङ्गे प्रभुराह तम् । चेद्वेदज्ञोऽसि विप्रौ द्राग्विवादेन पराजहि ।।५५।।**
**इति श्रुत्वेशवाक्यं तौ प्रत्याहितधियौ भिया । कम्पितौ श्रीगुरुं गत्वा विप्रौ शरणमूचतुः ।।५६।।**
**ब्रह्मद्विषौ स्वः पापिष्ठौ दुष्टसङ्गाहितभ्रमौ । मूढौ नौ दुर्गतिं यान्तौ समद्धर्तुं हरेऽर्हसि ।।५७।।**

चतुर्थीं वै 'कृषिपटुः शूद्रः अस्मि' इति अभिभाषितम्। पञ्चमीं 'सोमदत्ताख्यः वैश्यः अस्मि' इति उदितम्। ततः..।५३। षष्ठीं 'अहं गोवर्धनाख्यः शूरः क्षत्रियः' इति ईरितम्। सप्तमीं 'वेद+शास्त्र+ज्ञः ब्राह्मणः अस्मि' इति भाषितम्।५४। प्रभुः तदा अस्य अङ्गे मंत्रितं भस्म क्षिप्त्वा तं प्राह, 'चेत् वेदज्ञः असि, विप्रौ द्राक् विवादेन पराजहि।'५५। इति ईश+वाक्यं श्रुत्वा तौ भिया प्रत्याहत+धियौ कम्पितौ विप्रौ श्रीगुरुं शरणं गत्वा ऊचतुः।५६। (हे) हरे, नौ ब्रह्म+द्विषौ पापिष्ठौ, दुष्ट+संगा+हित+भ्रमौ मूढौ दुर्गतिं यान्तौ समुद्धर्तुं अर्हसि।५७।

चौथी रेषा ओलांडतांच तो स्वतःला 'शूद्र जातीचा शेतकरी' म्हणवू लागला तर पांचव्या रेषेजवळ 'सोमदत्त नांवाचा वैश्य' असल्याचे सांगूं लागला.५३. सहाव्या रेघेवर तो स्वतः 'गोवर्धन नांवाचा शूरवीर क्षत्रिय' असल्याचे सांगू लागला. शेवटची सातवी रेघ ओलांडतांच तो आपण 'वेदशास्त्र जाणणारे ब्राह्मण आहोत' असे म्हणाला.५४. श्रीदत्तप्रभूंनी त्या अंत्यजाच्या शरीरावर भस्म प्रोक्षण केले आणि त्याला म्हणाले, 'तूं वेदांचा जाणता आहेस ना? तर मग या दोघा ब्राह्मणांशी वाद करून त्यांचा पराभव कर!'५५. हे प्रभूंचे वचन ऐकून त्या ब्राह्मणांची भीतीने गाळण उडाली, बुद्धी काम करीना आणि ते थरथर कांपत श्रीगुरूंना शरण गेले आणि (खालीलप्रमाणे) बोलले.५६. 'पापताप हरणाऱ्या श्रीगुरो! आम्ही ब्रह्मद्वेषी, पापरत, कुसंगतीने मतिभ्रष्ट झालेले मूढ आहोत. आमचा नरकाच्या वाटेवरून उद्धार करा. तेच आपल्या ब्रीदाला शोभून दिसेल.५७.

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**म्लेच्छाग्रे पठिता वेदा धिक्कृता ब्राह्मणा यतिः । तत्कर्मपरिपाकार्थं राक्षसौ द्राग्भविष्यथः ।।५८।।**
**सन्तप्तत्वादद्द्वादशाब्दानुषित्वा शान्तरूपतः । पठ्यमानानुवाकोप-देशाद्विप्राय वां गतिः ।।५९।।**
**इत्युक्तौ गुरुणा गत्वा भीमां स्नात्वा मृतावुभौ । राक्षसौ गुरुवाक्यात्तौ भूत्वा तत्रैव तस्थतुः ।।६०।।**
**तत्र यान्द्वादशाब्दान्ते द्विजो विस्मृतवान्मनुम् । तस्मै शशंसतुस्तं तौ तदा मुक्तौ स्वरीयतुः।।६१।।**

श्रीगुरुः उवाच। 'म्लेच्छ+अग्रे वेदा पठिता, ब्राह्मणा यतिः धिक्कृता। तत्+कर्म+परिपाक+अर्थं द्राक् राक्षसौ भविष्यथः।५८। संतप्तत्वात् शान्तरूपतः द्वादश+अब्दान् उषित्वा, विप्राय पठ्यमान+अनुवाक+उपदेशात् वां गतिः।'५९। इति गुरुणा उक्तौ भीमां गत्वा स्नात्वा उभौ मृतौ। गुरु+वाक्यात् तौ राक्षसौ भूत्वा तत्र एव तस्थतुः।६०। द्वादश+अब्द+अन्ते तत्र यान् द्विजः मनुं विस्मृतवान्। तौ तस्मै तं मंत्रं शशंसतुः। तदा मुक्तौ स्वः ईयतुः।६१।

श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'म्लेच्छ म्हणजे गोमांसभक्षक, धर्मविरुद्ध अति बोलणारा आणि कसलेही आचार न पाळणारा (बोधायनस्मृति). अशांच्या समोर तुम्ही वेदपठण केलेत; वेदांनी (कृ. यजु. तै. संहिता १:७:३:१) ज्यांना प्रत्यक्ष देवतास्वरूप मानले आहे आणि छांदोग्य उपनिषदांत ज्याची निन्दा करण्याला निषेध केला आहे अशा ब्राह्मणांचा धिक्कार तुम्ही केला आहे. संन्यासी हे साक्षात् गुरुस्वरूप आहेत. गुरुगीतेत (१०४) सांगितल्याप्रमाणे 'गुरूंचा अधिक्षेप करणारा आणि ब्राह्मणांना वादाने खाली पाहायला लावणारा निर्मनुष्य अरण्यांत राक्षस होतो.' या सर्व कर्मांच्या फलस्वरूप तुम्हांला तात्काळ ब्रह्मराक्षसांच्या योनीत जावे लागेल.५८ तुम्हांला आत्तां झालेल्या पश्चात्तापामुळे, तुम्ही बारा वर्षे शांत अवस्थेत राहाल. त्यानंतर एका ब्राह्मणाला त्याला न आठवणारा यजुर्वेदांतला अनुवाक सांगण्याने तुम्ही त्या राक्षसयोनीतून मुक्त व्हाल.' इथे उपदेश शब्द योजला असला तरी लाक्षणिक अर्थ 'सांगणे' असाच ग्राह्य आहे.५९. असा श्रीगुरूंचा निरोप मिळतांच ते उभयतां भीमेच्या तीरावर गेले. तिथे स्नान करतांच ते मरण पावले आणि ब्रह्मराक्षस होऊन तिथेच एका झाडावर राहिले.६०. बारा वर्षांनी तिथून जाणाऱ्या एका ब्राह्मणाला मंत्राचे विस्मरण झाले. त्याला त्यांनी तो मंत्र सांगतांच ते राक्षस मुक्त होऊन स्वर्गलोकाला गेले.६१.

**स्वधर्ममुत्सृज्य मदेन ये द्विजान् गुरून्द्विषन्तः खलु राक्षसा वने ।**
**भवन्ति पापोऽपि यदानुतापितः कनिष्ठशिक्षो भवति द्विजाविव ।।६२।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे वेदोपदेशो नाम प्रथमोऽध्यायः ।।१।।**

**आदितश्चतुर्दशोऽध्यायः ।।१४।।**

**सप्ताहपारायणे तृतीयः। अन्ते रसज्ञा वशा.. स्तोत्रं पठनीयम् । अन्यदिने आरंभे गुरुस्तुतिः ।**

ये स्वधर्मं उत्सृज्य मदेन द्विजान् गुरून् द्विषन्तः (ते) खलु वने राक्षसा भवन्ति। पापः अपि यदा अनुतापितः द्विजौ इव कनिष्ठ+शिक्षो भवति।६२।

जे आपला धर्माचार टाकून मदांध होऊन ब्राह्मणांचा आणि गुरूचा द्वेष करतात ते नक्कीच अरण्यांत राक्षस होतात. पापी जरी असला तरी त्याला पश्चात्ताप झाला तर मात्र त्या ब्राह्मणासारखीच त्याची शिक्षा कमी होते.६२.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला पहिला आणि प्रथमपासून चौदावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। पञ्चदशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**पतितस्य ततो जातं किमु हीनोऽप्यनुग्रहात् । श्रीमद्भगवतो वेद-शास्त्रज्ञोऽस्मीति योऽब्रवीत् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**प्रसादात्सद्गुरोर्ज्ञानी भूत्वाह पतितो हरिम् । ब्राह्मणस्यापि मे कस्मादधःपातोऽभवद्धरे ।।२।।**

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**कर्मणा भ्रममाणस्य यन्त्रवत्पुण्यपापतः । प्रकृत्यायत्तचेष्टस्य जन्तोरूर्ध्वमधोगती ।।३।।**

नामधारक उवाच। 'श्रीमद्भगवतः अनुग्रहात् यः वेद+शास्त्र+ज्ञः अस्मि इति अब्रवीत् (तस्य) पतितस्य उ ततो किं जातम्?'१। सिद्ध उवाच। 'सद्गुरोः प्रसादात् ज्ञानी भूत्वा पतितो हरिं आह, (हे) हरे, मे ब्राह्मणस्य अपि कस्मात् अधःपातः अभवत्?'२। श्रीगुरुः उवाच। कर्मणा यन्त्रवत् भ्रममाणस्य प्रकृति+आयत्त+चेष्टस्य जन्तोः पुण्य-पापतः ऊर्ध्वं+अधो+गतिः।३।

**श्रीगणेशाय नमः। अथ पञ्चदशोऽध्यायः। कर्मविपाक उपदेशुनी पंचादशीं अंत्यजाचे ज्ञान हरिले। यतीला प्रायश्चित्त तसे भस्ममाहात्म्य निरूपिले।।१।।** मागील अध्यायांत माझ्या वर्तनाला प्रमाण मानून लोक तसेच आचरण करतील, हे बरे नव्हे हा श्रीगुरूंचा विचार मांडून वेदांचा अवमान आणि ब्राह्मणांचा अधिक्षेप केल्याने ब्राह्मणाचाही कसा अधःपात होतो ते सांगितले. आता संवादरूपाने दुष्कर्मानि दुर्गती तसेच प्रायश्चित्ताने संशुद्धी कशी होते ते सांगत आहेत.

नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, 'भगवान श्रीगुरूंच्या प्रसादाने अंत्यज असूनही 'मी वेदशास्त्रांचा जाणकार आहे' असे म्हणणाऱ्या त्या पतिताचे पुढे काय झाले?'१. सिद्धमुनी म्हणाले, सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने ज्ञानी झालेला तो अंत्यज पापहर सद्गुरूंना संबोधून म्हणाला, 'मी पूर्वजन्मी ब्राह्मण असूनही मला हा अंत्यजाचा जन्म कां आला?'२. श्रीगुरू त्याला सांगूं लागले. 'कर्माच्या चक्रावर यन्त्राप्रमाणे फिरत असलेल्या, प्रकृतीला अनुसरून विविध कर्मे करणाऱ्या जीवाची पुण्याने ऊर्ध्वगती आणि पापाने अधोगती होते.'३.

**गुरुमातापितृस्त्र्यर्भ-धर्माचारकुलेश्वरान् । यो जहाति मुधा सोऽपि जीवहिंस्रोऽनृतप्रियः ।।४।।**
**खलः कन्याश्वगोक्रेता गृहग्रामवनाग्निदः । त्यक्तश्राद्धः परान्नाशीः कालाप्तातिथिहापकः ।।५।।**
**सद्विप्रदेवतीर्थार्च्य-वेदशास्त्रादिनिन्दकः । तडागकूपारामाध्व-क्रतुध्वंसी व्रताहभुक् ।।६।।**
**श्राद्धार्च्याहाम्बुपर्वाह्नि-स्त्रीभुग्विश्वासघातकः । दत्तदानहरः स्वोक्त-व्यस्ताचारोऽन्यकर्मकृत् ।।७।।**

यो गुरु+माता+पितृ+स्त्री+अर्भ+धर्म+आचार+कुलेश्वरान् मुधा जहाति सः अपि जीव+हिंस्रः अनृत+प्रियः।४। खलः कन्या+अश्व+गो+क्रेता गृह+ग्राम+वन+अग्नि+दः त्यक्त+श्राद्धः परान्नाशीः काल+आप्त+अतिथि+हापकः।५। सत्+विप्र+देव+तीर्थ+अर्च्य+वेद+शास्त्र+आदि+निंदकः; तडाग+कूप+आराम+अध्व+क्रतु+ध्वंसी; व्रत+आह+भुक्; ।६। श्राद्ध+अर्चा+अहे अम्बु+पर्व+अह्नि स्त्रीभुक्; विश्वास+घातकः; दत्त+दान+हरः; स्व+उक्त+व्यस्त+आचारः; अन्य+कर्म+कृत्;।७।

इथे श्रीगुरू बुरुडाने विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरी चंडाल या नीचतम जातीत जन्म घेण्यास कारणीभूत कर्मे सांगत आहेत. गुरू, आई, वडील, पत्नी, (स्वतःचे) मूल, धर्माचे आचरण तसेच कुलदैवत यांचा, निष्कारण त्याग करणारा; जीवांची हिंसा करणारा; असत्य भाषण करणारा;४. दुष्ट माणूस; मुलगी, घोडा किंवा गाय यांना विकणारा; घराला, गांवाला किंवा वनाला आग लावणारा; श्राद्ध न करणारा; परान्नावर जगणारा; जेवणाच्या वेळी आलेल्या अतिथीला हाकलून देणारा;५. साधुसंत, ब्राह्मण, तीर्थ, पूज्य व्यक्ती, वेद, शास्त्र इत्यादींची निंदा करणारा; तलाव, विहीर, बाग, मार्ग, यज्ञ यांचा नाश करणारा;६. श्राद्धाच्या, एकादशी वगैरे व्रताच्या किंवा पूजेच्या दिवशी, पाण्यांत, दर्शादि पर्वकाळांत स्त्रीशी संभोग करणारा; विश्वासघातकी; दान दिलेली वस्तू परत घेणारा; एक बोलून दुसरेच करणारा; आपल्याला अधिकार नसलेले कर्म करणारा;७.

**स्वपुण्यपरपापास्यो दम्भाद्यैः सत्त्वदर्शकः । खलहिंस्रस्तेयिसङ्गी घातज्ञो जारणादिकृत् ।।८।।**
**ज्ञानं विना चिकित्साशी कर्मभ्रष्टोऽन्यतापकृत् । इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डालयोनिगाः ।।९।।**
**क्रोधी शूद्रीरतस्त्यक्तनित्यनैमित्तिकक्रियः । वृषगोवृषलीसक्तोरसगोवेदविक्रयी ।।१०।।**
**अदत्वेशं कपिलगोदुग्धपोऽतिनिषिद्धभुक् । प्रतिग्रही पराजीवजीवी सन्ध्याशयी कुवाक् ।।११।।**
**इत्याद्या ब्राह्मणास्तेऽपि पूर्ववत्संभवन्ति हि । जीवजातिमिताः सन्ति नरका एकविंशतिः ।।१२।।**

स्व+पुण्य+पर+पाप+आस्यः, दम्भ+आद्यैः सत्त्व+दर्शकः, खल+हिंस्र+स्तेयि+संगी, घातज्ञः, जारण+आदि+कृत्,।८। ज्ञानं विना चिकित्साआशीः, कर्मभ्रष्टः, अन्य+ताप+कृत् इत्याद्याः प्रेत्य नरकं भुक्त्वा चण्डाल+योनिगाः।९। क्रोधी, शूद्रीरत, त्यक्त+नित्य+नैमित्तिक+क्रियः वृषगः वृषली+सक्तः, रस+गो+वेद+विक्रयी,।१०। ईशं अदत्वा कपिल+गो+दुग्धपः, अतिनिषिद्ध+भुक्, प्रतिग्रही, पराजीव+जीवी, सन्ध्या+शयी कुवाक्।११। इत्याद्या ब्राह्मणाः ते अपि पूर्ववत् संभवन्ति हि। जीवजातिमिताः नरकाः सन्ति। (तेषु) एकविंशतिः।१२।

आपले पुण्य आणि दुसऱ्याचे पाप बोलून दाखविणारा; दंभ वगैरेनी आपल्या साधुत्वाची जाहिरात करणारा; दुष्ट, हिंसक, चोर यांच्या संगतीत असणारा; घातकी; जारण-मारणादि प्रयोग करणारा;८. वैद्यकाचे ज्ञान नसतांना औषधोपचार करून पैसे कमावणारा; आपल्या विहित कर्माचा त्याग करणारा; दुसऱ्यांना पीडा करणारा इत्यादि मृत्यूनंतर नरक भोगून चण्डाल योनीत जन्म घेतात.९. कोपिष्ट, शूद्रस्त्रीशी संग करणारा, नित्य व नैमित्तिक कर्मांचा त्याग करणारा, बैलावर बसणारा, कलावंतिणीवर आसक्त असलेला, विषारी पदार्थ, गाय किंवा वेद यांचा विक्रय करणारा,१०. कपिला गाईचे दूध ईश्वराला अर्पण न करता आपणच पिणारा, कांदा, लसूण इत्यादि अतिनिषिद्ध पदार्थ खाणारा, दुष्टाचे दान घेणारा, दुसऱ्याची उपजीविका हरण करणारा, संध्याकाळी झोपणारा, तोडात सतत शिवीगाळी असणारा,११. इत्यादि ब्राह्मणही वरीलप्रमाणेच नरक भोगून हीन जातीत जन्म घेतात. जीवांच्या योनीइतकेच म्हणजे ८४ लक्ष इतके नरक आहेत.१२.

**तेषु श्रेष्ठा जीवपापविपाका अन्तकालये । तेष्वन्तकः क्षिपत्येतान्पापिनः पापभुक्तये ।।१३।।**
**त्यक्त्वा पुष्टमपीह वर्ष्म कलुषी यान्यातनाङ्गेन तृट्- । क्षुच्छीतोष्णसुपीडितो यमचरैर्बद्धोऽयने दुर्गमे ।।**
**मूर्छन् तर्जनताडनादिभिरसन्वै वैतरिण्यर्दितो । भुङ्क्ते याम्यमवाप्यराष्ट्रमवशस्तां यातनां नारकीम् ।।१४।।**
**ततो योन्यन्तरे याति भुक्तदुःखोऽप्यघांशतः । प्रायशो वासनाभूम्नो भूतप्रेतपिशाचताम् ।।१५।।**

अन्तक+आलये तेषु (एकविंशति) श्रेष्ठाः जीव+पाप+विपाकाः। तेषु अन्तकः पापिनः पापभुक्तये क्षिपन्ति।१३। कलुषी इह पुष्टं अपि वर्ष्म त्यक्त्वा यातना+अङ्गेन यमचरैः बद्धः क्षुत्+शीत+उष्ण+सुपीडितः दुर्गमे अयने यान् असन् तर्जन+ताडनादिभिः मूर्छन् वै वैतरिणी अर्दितः अवशः याम्यं राष्ट्रं अवाप्य तां नारकीं यातनां भुङ्क्ते।१४। ततः भुक्त+दुःखः अपि अघ+अंशतः योनि+अंतरे याति। वासना+भूम्नः प्रायशः भूत+प्रेत+पिशाचतां (याति)।१५।

(पण त्यांतील २१...) जीवांच्या पापांचा परिपाक अशा त्या नरकांतील एकवीस मुख्य आहेत. यमाच्या नगरीत हे सर्व नरक आहेत. यमराज पापी लोकांना त्यांच्या पापाचा भोग देण्यासाठी यांत टाकतो.१३. मृत्यूनंतर पापी जीव आपला स्थूल देह कितीही पुष्ट असला तरी तो इथेच टाकून यातनादेह धारण करतो. यमदूत त्याच्या त्या यातनादेहाला बांधून, तहान, भूक, शीत, उष्ण इत्यादींनी तळमळत, दुर्गम आणि कठीण मार्गाने त्याला ठोकत, मारत, ओढून घेऊन जातात. वैतरिणी नदीतून असह्य कष्ट भोगीत तो पापी जीव विवश होऊन यमाच्या देशात पोचतो. आणि तिथे तो आपल्या पापाला अनुसरून भयंकर आणि अनिर्वाच्य नरकयातना भोगतो.१४. तिथे - यमलोकांत, यातना भोगल्यानंतर अवशिष्ट पापामुळे दुसऱ्या योनीत जन्म घेतो. ज्या जीवांच्या वासना प्रचुर आहेत त्यांना बहुधा भूत, प्रेत किंवा पिशाच योनीत जावे लागते.१५.

**हुंतुंकाराद्गुरोर्विप्राभिभवाद्ब्रह्मराक्षसः । गर्दभो हीनसेवी स्यात् कुक्कुटोऽतिथिहापकः ।।१६।।**
**उष्ट्रोऽर्थहृद्वनचरः फलपत्रार्थहृद्भवेत् । मधु दंशः पलं गृध्रोऽन्नमाखुश्चातको जलम् ।।१७।।**

गुरोः हुं-तुंकारात्, विप्र+अभिभवात् ब्रह्मराक्षसः, हीन+सेवी गर्दभः, अतिथि+हापकः कुक्कुटः स्यात्।१६। अर्थहृत् उष्ट्रः, फल+पत्र+अर्थ+हृत् वनचरः, मधु(हृत्) दंशः, पलं(हृत्वा) गृध्रः, अन्नं (हृत्वा) आखुः, जलं (हृत्वा) चातकः।१७।

**मृत्यूने सर्व कर्मांचा नाश होत नाही. -** एकाच कर्माची परस्परविरोधी अशा विविध योनीत भोगतां येणारी फळे आहेत, तसेच (ब्रह्महत्यादि) एकेका कर्मापासून वेगवेगळ्या अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो, असे शास्त्रवचन आहे. स्थावरादि योनीत गेलेल्या अत्यंत मूढ योनीतील जीवांना वरच्या योनीत जाण्याचे कर्म करतां येत नाही; गर्भावस्थेतच स्राव झालेल्या जीवांकडून कांहीही कर्म घडूंच शकत नाही. म्हणजे या सर्वांचे संसरणच थांबायला हवे. पण तसे होत नाही. त्यामुळे असे निश्चित होते की एकाच जन्मांत सर्वच कर्मांचा उपभोग होऊ शकत नाही. कांही लोक असे म्हणतात की 'मृत्यूच्या वेळी सर्व कर्मांच्या आधाराचा (वासनांचा) उपमर्द झाल्यावरच नव्या जन्माचा आरंभ होतो. त्यांच्या मते कांही कांही कर्मे (भावी जन्मांच्या) आरंभकत्वाने स्थिर राहतात व कांही जन्मांतराला कारणीभूत होतात हे सयुक्तिक नाही. 'मरण हे सर्व कर्मांना अभिव्यक्त करते, जसा दिवा आपल्या आसमंतांतील सर्व वस्तूंना अभिव्यक्त करतो. अर्थात् नवा जन्म आरंभ होतांनाच आधीच्या सर्व कर्मांचा नाश होतो.' हे मत खरे नाही. सर्वाच्या (इथे संपूर्ण कर्माशयाच्या) सर्वात्मकत्वामुळे, देश, काल आणि निमित्त यांच्या मर्यादांमुळे, सर्वात्मनाचा अंशतः उपमर्द किंवा कधी कांही अभिव्यक्ति असे होत नाही. तसेच कर्मांच्या आणि त्यांच्या आश्रयांच्या (वासना) विषयी आहे. पूर्व जन्मी अनुभवलेल्या मर्कट, मनुष्य, मोर इत्यादि जन्मांनी संस्कारित अशा अनेक वासना मर्कट जन्माला कारणीभूत कर्मांने - मर्कट जन्माच्या आरंभाने नष्ट होत नाहीत तशीच अन्य जन्मांत प्राप्त झालेली कर्मेही नाश पावत नाहीत हे सयुक्तिकच आहे. मर्कट योनीत जन्म झाल्याने मागील सर्व जन्मांत अनुभवलेल्या वासनांचा नाश होतो असे मानले तर माकडाच्या

**गन्धान् छुच्छुन्दरी धान्यं शलभोऽलिर्विषं तथा । कृमिः कीटः पतङ्गः स्यात् स्वर्णं हृत्वा तृणं पशुः ।।१८।।**
**काको निर्मन्त्रभुग्गृध्रो मित्रध्रुग्दाम्भिको बकः । इत्याद्या बहुशो योनीर्भुक्त्वा रुग्णा भवन्त्यथ ।।१९।।**

गन्धान् (हृत्वा) छुच्छुंदरी, धान्यं शलभः, विषं अलिः, स्वर्णं हृत्वा कृमिः, कीटः, पतङ्गः, तृणं (हृत्वा) पशुः स्यात्।१८। निर्मन्त्र+भुक् काकः, मित्र+ध्रुक् गृध्रः, दाम्भिकः बकः (स्यात्)। इत्याद्या बहुशः योनीः भुक्त्वा अथ रुग्णा भवन्ति।१९।

एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडी मारण्याचे जन्मजात कौशल्य, तसेच आईच्या पोटाला चिकटून राहण्याचे कौशल्य त्याला कुठून आले? ह्या जन्मी तरी त्याचा त्याने अभ्यास केलेला नाही. तसेच या जन्माच्या आधीचा त्याचा जन्म मर्कटाचाच असेल असे सांगतां येत नाही. मृत्यूच्या वेळी 'जीव आपले ज्ञान, कर्म आणि पूर्वानुभव यांना घेऊन जातो' असे बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) म्हटले आहे. यावरून वासनांप्रमाणेच सर्व कर्मांचा उपमर्द होत नाही. ज्या अर्थी शेष कर्म आहे त्या अर्थी त्यापासून अन्यान्य योनीत जन्म घ्यावा लागणार अशी संसाराची उपपत्ती लागते.

गुरूंना 'हुं', 'तुं' इत्यादि अवमानकारक बोलल्याने आणि ब्राह्मणांचा पराभव करण्याने ब्रह्मराक्षसाचा, खालच्या जातीची सेवा करण्याने गाढवाचा तर अतिथीला हाकलणाऱ्यास कोंबड्याचा जन्म येतो.१६.

**चोरीची फळे -** कोणत्या पदार्थाची चोरी केल्याने कोणती योनी मिळते हे पुढे सांगत आहेत. द्रव्य चोरणारा उंट, फळे-पाने चोरणारा वानर, मध चोरणारा गांधिलमाशी, मांस चोरणारा गिधाड, अन्न चोरणारा उंदीर तर पाण्याची चोरी करणारा चातक होतो.१७. गंधचोर चिचुंद्री, धान्यचोर टोळ, विषचोर विंचू, सुवर्णचोर कृमी, कीट वा पतंग आणि गवत चोरणारा पशू होऊन जन्माला येतो.१८. आमंत्रण नसतांना (आगंतुक) जेवणारा कावळा, मित्रद्रोही गिधाड, दंभ करणारा बगळा होतात. अशा अनेक योनीत फिरून उरलेल्या पापांशाने तो इथे मनुष्यजन्मात रोगी होतो.१९.

**हृद्रोगी परहृद्भेत्ता गुरुत्यागी महामयी । क्षयी तु ब्रह्महा कुष्ठी स्वर्णहृत्पुस्तकापहा ।।२०।।**
**जन्मान्धो विश्वासघाती वमी गण्डी गणार्थहृत् । अपुत्रोऽन्यार्थहृद्वस्त्र-हृच्छ्वित्री चानृती कुवाक् ।।२१।।**
**गुल्म्यन्नहृत्कुरुङ्मांस-भोक्ता क्वास्यस्तु तैलहृत् । पामी फलादिहृच्छ्वित्री कांस्यकार्पासलोहहृत् ।।२२।।**
**देवार्थहृत्पाण्डुरोगी रोगाः सर्वेऽत्र पापतः । परस्त्र्यालिङ्गनाज्जन्म शतं श्वा तद्भगेक्षकः ।।२३।।**
**अन्धो बन्ध्वङ्गनाभोगी गर्दभोऽहिश्च दुर्धिया । परस्त्र्यालिङ्गनान्नूनं हृद्रोगी ह्यष्टधा रतिः।।२४।।**

पर+हृद्+भेत्ता हृद्+रोगी, गुरु+त्यागी महामयी, ब्रह्महा तु क्षयी, स्वर्ण+हृत् कुष्ठी, पुस्तक+अपहा जन्मांधः,।२०। विश्वास+घाती वमी, गणार्थ+हृत् गण्डी, अन्य+अर्थ+हृत् अपुत्रः, वस्त्र+हृत् श्वित्री च अनृती कुवाक्।२१। अन्नहृत् गुल्मी, मांसभोक्ता कुरुक्, तैलहृत् तु कु+आस्यः, फलादिहृत् पामी, कांस्य+कार्पास+लोह+हृत् श्वित्री।२२। देवार्थहृत् पांडुरोगी, अत्र सर्वे रोगाः पापतः। पर+स्त्री+आलिंगनात् जन्म+शतं श्वा, तत्+भग+ईक्षकः अन्धः,।२३। बन्धु+अङ्गना+भोगी गर्दभः, पर+स्त्री+आलिंगनात् नूनं हृद्+रोगी हि अष्टधा रतिः।२४।

कुणाच्याही मर्मी लागेल असे बोलणाऱ्याला हृदयरोग होतो. गुरूचा त्याग करण्याने कुष्ठरोगी, ब्रह्महत्या करणारा क्षयी तर पुस्तक चोरणारा जन्मांध होतो.२०. विश्वासघातकी वांतिरोगी, सामूहिक द्रव्याचा अपहार करणारा गंडमाळारोगी, परद्रव्यापहारी निपुत्रिक, वस्त्रे चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२१. अन्न चोरणारा गुल्मरोगी (कर्करोगी), मांस खाणारा गलत्कुष्ठी, तेल चोरणारा वांकड्या तोंडाचा, फळे वगैरे चोरणारा त्वचारोगी (खरुज वगैरे), कांसे, कापूस किंवा लोखंड चोरणारा श्वेतकुष्ठी होतो.२२. देवस्वाचा अपहार करणारा पांडुरोगी होतो. ह्या मनुष्यदेहात सर्वच रोग पापापासून होतात.२३. **व्यभिचार -** आता व्यभिचारकर्माची फळे सांगतात. परस्त्रीला आलिंगन दिले तर तो शंभर जन्म कुत्रा होतो; तिची (परस्त्रीची) योनी पाहिली तर आंधळा होतो; बंधुभार्येशी संभोग करणारा गाढवजन्माला जातो; परस्त्रीला आलिंगन दिले तर हृदयविकार होतो. नुसत्या आलिंगनानेही कसे पाप लागते याचे स्पष्टीकरण म्हणून रतीचे (कामक्रीडेचे) आठ प्रकार असतात असे स्पष्ट केले आहे. स्मरण, कीर्तन, क्रीडा, प्रेक्षण, उत्साह, अध्यास आणि प्रत्यक्ष संभोग असे आठ मैथुनाचे प्रकार अग्निपुराणांत वर्णिले आहेत. (*'स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणं। उत्साहोऽध्यवसायच क्रियानिष्पत्तिरेव च'।।३१०:९-१०)*२४.

**श्वा मातुलसखिस्त्रीभुक् कृमिः स्यादौपपत्यतः । स्वैरिण्योऽपि स्त्रियः श्वादि-योनिं गत्वा व्यथन्त्यलम् ।।२५।।**
**इति संवादमाकर्ण्य गुरुं प्राह त्रिविक्रमः । ज्ञानाद्वाऽज्ञानतो जातं कथं पापं प्रणश्यति ।।२६।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**पश्चात्तापेन संशुद्धिः प्रायश्चित्तादिभिः पुनः । सदस्युच्चार्य पापं स्वं ब्रह्मदण्डं निधाय च ।।२७।।**
**सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृतपापानुसारतः । कृच्छ्राब्दादि चरेच्छक्त्याऽशक्तो गोऽर्घादिनाऽशठः।।२८।।**

मातुल+सखि+स्त्रीभुक् श्वा, औपपत्यतः कृमिः स्यात्। स्वैरिण्याः स्त्रिया अपि श्वादि योनिं गत्वा अलं व्यथन्ति।२५। इति संवादं आकर्ण्य त्रिविक्रमः गुरुं प्राह, ज्ञानात् वा अज्ञानता जातं पापं कथं प्रणश्यति?२६। श्रीगुरुः उवाच। 'पश्चात्तापेन, पुनः प्रायश्चित्तादिभिः संशुद्धिः। सदसि स्वं पापं उच्चार्य, ब्रह्मदंडं च निधाय,।२७। सभ्याज्ञया क्षौरपूर्वं कृत+पाप+अनुसारतः शक्त्या चरेत्। अशक्तः गो-अर्घ-आदिना अशठः (चरेत्)।'२८।

मामाच्या किंवा मित्राच्या स्त्रीशी संभोग केल्यास कुत्र्याचा जन्म तसेच व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना कृमीचा जन्म मिळतो. स्वैराचारी स्त्रियासुद्धा श्वानादि योनीत जाऊन अतिशय कष्ट भोगतात.२५.

**प्रायश्चित्त -** हा संवाद ऐकून त्रिविक्रम मुनींनी श्रीगुरूंना विचारले, कळत वा न कळत घडलेल्या पापाचा नाश कसा करतां येईल?

श्रीगुरू सांगत आहेत. पश्चात्तापाने तसेच प्रायश्चित्ताने उत्तम प्रकारे पापाची शुद्धी होते. विद्वान् ब्राह्मणांच्या सभेत प्रथम गाय, बैल किंवा द्रव्यस्वरूपांत ब्रह्मदंड द्यावा आणि आपल्या पापाचा उच्चार करावा.२७. नंतर सभेच्या आज्ञेने क्षौरपूर्वक केलेल्या पापाच्या तारतम्याने शक्त्यनुसार अब्दादि (वर्षभर आचरायचे) कृच्छ्रे अनुष्ठावीत. तेवढे अनुष्ठान करण्याची शक्ती नसेल तर गोदान करावे अथवा गाईच्या मूल्याएवढे द्रव्य दान करावे. किंवा निष्क (साडेबारा ग्रॅम) वा शक्य तेवढे सोने निष्कपटपणे द्यावे.२८.

**स्वल्पं तीर्थे दशस्नानाद् द्विशतास्वायमैरघम् । स्वर्णदानात्प्रणश्येत सद्गुरोर्दर्शनान्महत् ।।२९।।**
**त्र्यहं दिवा त्र्यहं सायं त्र्यहमद्यादयाचितम् । नाद्यात् त्र्यहं कायकृच्छ्रोऽयुतगायत्रिकाजपात् ।।३०।।**
**सहस्रहवनाद्वापि द्वादशद्विजभोजनात् । गोदानाच्छक्तितोऽर्घाद्वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति ।।३१।।**
**द्वादशद्युः पञ्चदश-ग्रासा भोज्याः सदा निशि । मासाच्छुद्धिः स्वल्पभुज्या क्षीराज्याद्याशनैश्च वा ।।३२।।**

स्वल्पं अघं तीर्थे दश+स्नानात्, द्विशत+असुयामैः (वा) प्रणश्येत्। महत् (पापं) स्वर्णदानात् सद्गुरोः दर्शनात् (वा) प्रणश्येत।२९। त्रि+अहं दिवा त्र्यहं सायं, त्र्यहं अयाचितं अद्यात्, त्र्यहं न अद्यात् कायकृच्छ्रः, अयुत+गायत्री+जपात् (वा)।३०। सहस्र+हवनात् वा, द्वादश द्विज+भोजनात्, गोदानात्, शक्तितः अर्घात् वा प्राजापत्यः प्रसिद्ध्यति।३१। द्वादश+द्युः पञ्चदश ग्रासाः भोज्याः, सदा निशि स्वल्पभुज्या मासात् शुद्धिः, क्षीर+आज्य+अशनैः च वा (शुद्धिः)।३२।

लहानसहान पापे तीर्थांत दहा स्नाने (प्रत्येक स्नानानंतर केस वाळेपर्यंत थांबून) केल्याने तसेच दोनशे प्राणायामांनी नष्ट होतात. महापाप सुवर्णदानाने किंवा सद्गुरूंच्या दर्शनाने नाश पावते.२९.

**प्राजापत्य कृच्छ्र -** तीन दिवस दिवसा, तीन दिवस रात्री आणि तीन दिवस अयाचित भोजन करून तीन दिवस उपोषण करावे म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होते; किंवा याचा पर्याय म्हणून दहा हजार गायत्रीचा जप करावा;३०. किंवा गायत्री मंत्राचे हजार तुपाच्या आहुतींचे हवन करावे; किंवा बारा ब्राह्मणांना भोजन द्यावे; तसे गाईचे किंवा शक्त्यनुसार तितक्या मूल्याचे दान करावे म्हणजेही प्राजापत्य कृच्छ्र संपन्न होते.३१. पंधरा घास दिवसा आणि बारा घास रात्री अन्न घ्यावे; किंवा महिनाभर रात्री अल्प (अंजुळी) आहार करावा; किंवा दूध-तुपावर राहावे म्हणजे शुद्धी होते.३२.

**बिल्वाश्वत्थाब्जदर्भाम्बु-पानात् तीर्थाटनादपि । वाराणसीस्नानमात्राल्-लीयन्ते पापकोटयः ॥३३॥**
**अन्यतीर्थे त्वनुष्ठानाद्रामेश्वरसमीपतः । अब्धिस्नानाद्ब्रह्महत्या-कृतघ्नाद्यघसंहृतिः ॥३४॥**
**लक्षसंख्याकगायत्री-जपान्मद्यपसंशुचिः । कोट्या ब्रह्मघ्नोऽष्टलक्षैर्गुरुतल्पगतस्य च ॥३५॥**
**सप्तलक्षात्स्वर्णहर्तुः पावमानीभिरप्युत । इन्द्रं मित्रं शुनःशेप-सूक्तं पौरुषशान्तिके ॥३६॥**
**त्रिसुपर्णं नाचिकेतमघमर्षणवैष्णवे । मासमात्रं जपेत्स्वल्पे षण्मासं च महत्यघे ॥३७॥**

बिल्व+अश्वत्थ+अब्ज+दर्भ+अंबु+पानात् तीर्थ+अटनात् अपि, वाराणसी+स्नान+मात्रात् पापकोटयः लीयन्ते।३३। अन्यतीर्थे तु अनुष्ठानात्। रामेश्वर+समीपतः अब्धि+स्नानात् ब्रह्महत्या+कृतघ्नादि अघ+संहृतिः।३४। लक्ष+संख्याक+गायत्री+जपात् मद्यप+संशुचिः। कोट्या ब्रह्मघ्नः, अष्टलक्षैः गुरु+तल्प+गतस्य च (शुद्धिः)।३५। सप्तलक्षात् स्वर्णहर्तुः (शुचिः)। पावमानीभिः अपि उत 'इंद्रं मित्रं', 'शुनःशेप', पौरुष+शांतिके।३६। त्रिसुपर्णं, नाचिकेतं, अघमर्षण+वैष्णवे, स्वल्पे (अघे) मासमात्रं जपेत्। महति अघे च षण्मासं जपेत्। ३७।

बेल, पिंपळ, कमळ यांच्या पानांनी किंवा कुशोदकाचे पाणी रोज घेऊन उपवास केल्याने पर्णकृच्छ्र होते. तसेच तीर्थयात्रांनी आणि काशीला गंगास्नानाने पापांच्या कोटी लयाला जातात.३३. अन्य तीर्थांत मात्र अनुष्ठानानेच पापनाश होतो. रामेश्वरासन्निध समुद्रस्नान केल्याने ब्रह्महत्या, कृतघ्नता इत्यादि पापांचा नाश होतो.३४.

**वेदमंत्रांनी शुद्धी -** एक लाख गायत्रीमंत्राचा जप केल्याने मद्यपानाचे पाप जाते. एक कोटी जपाने ब्रह्महत्येपासून, आठ लाखांनी गुरुतल्पगमनाच्या पापाची शुद्धी होते. (गायत्रीच्या) सात लाख जपाने सुवर्णचोरीच्या पापाची शुद्धी होते. सर्व पवमान सूक्ताच्या (*'स्वाधिष्ठया'*पासून *'क्षीरं सर्पिर्मधूदकं'* पठणाने शुद्धी आहे. किंवा 'इंद्रं मित्रं' या एका मंत्राचा जप करावा. तसेच *'शुनःशेप'*सूक्त, पुरुषसूक्त किंवा शांतिसूक्त (*'शं न इंद्राग्नि'* ह्या पंधारा ऋचा) हे पाठ करावेत.३६. नारायणीय उपनिषदांतील त्रिसुपर्ण (भोजनाच्या आरंभी म्हटले जाणारे), कठ उपनिषत्, अघमर्षणाचे मंत्र किंवा *'अतो देवा'* इत्यादि विष्णुमंत्र लहानसहान पापांच्या परिमार्जनासाठी महिनाभर जपावेत. मोठ्या पापासाठी सहा महिने जप करावा.३७.

**चान्द्रायणं चरेद्ग्रासानेकैकं वर्धयेत्सिते । पक्षेऽन्यके ह्रासयेत्तैः शुचिगव्याशनेन च ।।३८।।**
**गोमूत्रं गोमयं क्षीरं दध्याज्यं सकुशोदकम् । मिलित्वा मन्त्रवद्धुत्वा पिबेत्सर्वाघशान्तये ।।३९।।**
**उभौ समं ह्यनन्तर-कृताघेणापि दम्पती । लिप्यते पापिसंसर्गी सोऽपि पापी भवेत्समः ।।४०।।**
**प्रायश्चित्तानि चीर्णानि दुष्टं हरिपराङ्मुखम् । नदीव सौरभाण्डं न निष्पुनन्ति कथञ्चन ।।४१।।**

चान्द्रायणं चरेत्। सिते पक्षे एक+एकं ग्रासान् वर्धयेत्। अन्यके ऱ्हासयेत्। तैः शुद्धिः। (पंच)गव्य अशनेन च।३८। गोमूत्रं, गोमयं, क्षीरं, दधि, आज्यं सकुश+उदकं मिलित्वा मन्त्रवत् हुत्वा सर्वाघ+शान्तये पिबेत्।३९। दुष्टं हरि+पराङ्+मुखं चीर्णानि प्रायश्चित्तानि न निष्पुनन्ति। नदी सौरभाण्डं इव।४०। अनन्तर+कृत+अघेण उभौ अपि दम्पती समं लिप्यते। पापी+संसर्गी सः अपि समः पापी भवेत्।४१।

**चांद्रायण** व्रतानेसुद्धां शुद्धी होते. शुक्ल पक्षाच्या प्रतिपदेला एक घास भोजन करायचे आणि मग चंद्राच्या कलेनुसार एक एक घास वाढवीत पौर्णिमेला पंधरा घासाचे भोजन करायचे. एक घास कोंबडीच्या किंवा मोराच्या अंड्याएवढा किंवा ओल्या आंवळ्याएवढा असावा. कृष्ण पक्षात परत एक एक घास कमी करीत अमावस्येला पूर्ण उपोषण करायचे. याला यवमध्य चांद्रायण असे म्हणतात. याउलट पौर्णिमेला पंधरा घास घेऊन एक एक घास कमी करीत अमावास्येला उपोषण करून पुन्हा शुक्ल पक्षात एक एक घास वाढवीत जाणे याला पिपीलिकामध्य चांद्रायण असे नाव आहे. यांत पूर्ण महिन्यांत एकूण २४० घास घेतले जातात. याला पर्याय म्हणून कुणी रोज चार चार घासांचे जेवण दोन वेळा (शिशुचांद्रायण) किंवा आठ घास एक वेळा (यतिचांद्रायण) घेतात. पंचगव्यानेही शुद्धी होतेच ते पुढच्या श्लोकांत वर्णिले आहे.३८.

**पंचगव्य** गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप हे पांच (पंचगव्य) कुशजलांत मिसळून अभिमंत्रित करून प्याल्याने सर्व पापांची शांती होते.३९. पती-पत्नीमध्ये एकाने पाप केले तरी दोघांनाही सारखाच दोष लागतो. तसेच पापी माणसाशी संसर्ग ठेवणाराही एका वर्षांत तेवढाच पापी होतो.४०. बंद तोंडाची दारूची बाटली जशी नदीत कितीही बुचकळली तर शुद्ध होत नाही, त्याचप्रमाणे अश्रद्ध, ईश्वरपराङ्मुख आणि भक्तिहीन दुष्टाने कितीही प्रायश्चित्ते आचरली तरी तो शुद्ध होत नाही.४१.

**इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा पतितं प्राह सद्गुरुः । प्राङ्मातापितृसंत्यागाल्लब्धा चण्डालताऽत्र ते ।।४२।।**
**मासमात्रं नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि । प्राहान्त्यजो योजय मां त्वद्दृक्पूतं द्विजातिषु ।।४३।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**भूत्वापि पतिताद्वृद्धो देहस्तेऽसंस्कृतोऽशुचिः । वदन्ति पतितं न त्वामन्यत्प्रोक्तं कथं त्वया ।।४४।।**
**विश्वामित्रः पुरा क्षत्रो देवर्षित्वं तपोबलात् । देवान्ययाचे प्रोक्तं तैर्वसिष्ठात्स्वीकुरुष्व तत् ।।४५।।**

इति त्रिविक्रमं प्रोक्त्वा सद्गुरुः पतितं प्राह। 'प्राक् माता+पितृ+संत्यागात् ते अत्र चण्डालता।४२। मासमात्र नदीस्नानात् प्रेत्य विप्रो भविष्यसि।' अन्त्यजः प्राह, 'त्वत्+दृक्+पूतं मां द्विजातिषु योजय।'४३। श्रीगुरुः उवाच। 'पतितात् भूत्वा वृद्धः अपि ते देहः असंस्कृतः। त्वां पतितं अशुचिः वदन्ति। त्वया अन्यत् कथं प्रोक्तम्?'४४। पुरा क्षत्रः विश्वामित्रः तपो+बलात् देवान् देवर्षित्वं ययाचे। तैः प्रोक्तं 'तत् वसिष्ठात् स्वीकुरुष्व।'४५।

हे सर्व त्रिविक्रम स्वामींना सांगून समोरच्या चांडालाला सद्गुरू म्हणाले, 'पूर्वी मागील सातव्या जन्मांत तू आपल्या आई-वडिलांना टाकून दिल्याने ह्या जन्मांत तुला चांडाल योनी आली आहे.४२. एक महिनाभर नदीवर स्नान केल्याने तू शुद्ध होऊन मृत्यूनंतर ब्राह्मण जन्म पावशील.' त्यावर तो अंत्यज म्हणाला, 'आपल्या दृष्टिपाताने मी पवित्र झालो आहे. आतां मला ब्राह्मणांत मिळवून घ्या!'४३. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंत्यजापासून झालेल्या आणि त्याच ठिकाणी वाढलेल्या तुझ्या ह्या देहावर कसलेही संस्कार झाले नाहीत व होऊ शकत नाहीत. यासाठी तुला अस्पृश्य मानतात. तू हे भलतेच काय बोलतोस?'४४. 'पुरातन काळी क्षत्रिय कुळांत जन्म घेतलेल्या विश्वामित्राने आपल्या तपोबलाच्या आधारे देवांना आपल्याला ऋषित्व (ब्राह्मणत्व) देण्याची मागणी केली. देवांनी त्याला ते वसिष्ठ ऋषीकडून मान्य करून घ्यायला सांगितले.४५.

**वसिष्ठेनापि हीनत्वान्न दत्तं तत्सुतान्छतम् । हत्वा तं हन्तुकामोऽभूच्छङ्कितो ब्रह्महत्यया ।।४६।।**
**तदाज्ञया तपस्तप्तं तत्तु मेनकया हृतम् । विश्वामित्रः पुनस्तप्त्वा दग्धाङ्गोऽभूदृषीश्वरः ।।४७।।**
**तस्माद्भवान्तरे तेऽस्तु ब्रह्मत्वं गच्छ तेऽस्तु शम् ।।४८।।**

**।। पतित उवाच ।।**

**जाते स्वर्णेऽयसः पश्चात्कुतोऽयस्तद्वदप्यहम् ।।४९।।**

वसिष्ठेन अपि हीनत्वात् (तं देवर्षित्वं) न दत्तम्। (विश्वामित्रः) तत् सुतान् शतं हत्वा तं हन्तु+कामः अभूत्। ब्रह्महत्यया शङ्कितः।४६। तत् आज्ञया तपः तप्तम्। तत् तु मेनकया हृतम्। विश्वामित्रः पुनः तप्त्वा दग्ध+अङ्गः ऋषि+ईश्वरः अभूत्।४७। 'तस्मात् भव+अंतरे ते ब्रह्मत्वं अस्तु। गच्छ ते शं अस्तु।'४८। पतित उवाच। 'अयसः स्वर्णे जाते पश्चात् कुतः अयसः? तत् वत् अहं अपि।'४९।

वसिष्ठ ऋषींनीही त्याचा जन्म हीनकुळांत झाल्याने त्याला देवर्षित्व दिले नाही. तेव्हा विश्वामित्राने क्रोधाने त्याचे शंभर पुत्र ठार मारले. तो वसिष्ठांनाही मारायला उद्युक्त झाला; पण ब्रह्महत्येचा दोष लागेल या आशंकेने थांबला.४६. त्याच वसिष्ठांच्या आज्ञेने त्याने आणखी तप केले. पण इंद्राने पाठविलेल्या मेनकेने त्याचे हरण केले. विश्वामित्राने पुनः तसेच तप शरीर जळेपर्यंत केले आणि नूतन शरीर धारण करून तो ब्रह्म ऋषीची पदवी पावला.४७. एवढ्यासाठी या जन्मात नाही तरी पुढच्या जन्मात तू ब्राह्मण होशील. जा, तुझे कल्याण असो!४८. त्यावर पतित म्हणाला, 'एकदां लोखंडाचे सोन्यांत रूपांतर झाल्यावर ते पुन्हां लोखंड कसे होईल? त्याचप्रमाणे माझेही आहे. एकदा ब्राह्मण झाल्यावर मी परत चांडाल कसा होऊ?' ४९.

**तच्छुत्वा श्रीगुरुर्विप्र-भ्रान्त्या दूरात्स्त्रियं सुतान् । वारयन्तं वीक्ष्य शिष्यमाहामुं स्नापय द्रुतम् ।।५०।।**
**तदा लुब्धद्विजेनैष स्नापितः पतितः स्वकैः । सहागाद्विस्मृतप्राप्त-ज्ञानो हीनो निजालयम् ।।५१।।**

**।। त्रिविक्रम उवाच ।।**

**पतितोऽपि कृपादृष्ट्या पावितः स्नानमात्रतः । कथं स पूर्ववज्जातो भगवन्छिन्धि संशयम् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**क्षिप्तं भस्मार्पितं ज्ञानं विनष्टं क्षालनात्तु तत् । इयान् भस्मप्रभावः प्राग्वामदेवो महामुनिः ।।५३।।**

तत् श्रुत्वा (तथा) विप्र+भ्रांत्या स्त्रियं, सुतान् दूरात् वारयन्तं (तं पतितं) वीक्ष्य श्रीगुरुः शिष्यं आह, 'अमुं द्रुतं स्नापय।'५०। तदा लुब्ध+द्विजेन एष पतितः स्नापितः। विस्मृत+प्राप्त+ज्ञानः हीनः स्वकैः सह निजालयं अगात्।५१। त्रिविक्रम उवाच। 'पतितः अपि कृपा+दृष्ट्या पावितः। सः स्नान+मात्रतः कथं पूर्व+वत् जातः? भगवन् संशयं छिन्धि।'५२। श्रीगुरुः उवाच। 'भस्म क्षिप्त्वा ज्ञानं अर्पितं तत् तु क्षालनात् विनष्टम्। इयान् भस्म+प्रभावः। प्राक् वामदेवः महामुनिः वने चचार।५३।

त्याचे ते बोलणे ऐकून व तो आपल्याला बोलावणाऱ्या पत्नी व मुलांना दुरूनच परतवत असलेला पाहून श्रीगुरू शिष्याला म्हणाले, 'याला लवकर आंघोळ घाला!'५०. मग एका लोभी ब्राह्मणाने त्या पतिताला स्नान घातले. तेव्हा त्या चांडालाला आधी झालेले ज्ञान नष्ट झाले व तो कुटुंबीयांसह आपल्या घरी गेला.५१. हे सर्व पाहत असलेल्या त्रिविक्रम स्वामींनी श्रीगुरूंना विचारले, 'आपल्या कृपादृष्टीच्या प्रभावाने पावन झालेला हा चांडाल केवळ स्नानानेच कसा पहिल्यासारखा झाला? भगवंता, आपण ह्या माझ्या शंकेचे समाधान करावे.'५२. श्रीगुरू म्हणाले, 'भस्म टाकून त्याला ज्ञान दिले. भस्म धुवून टाकल्याबरोबर ते नाहीसे झाले! हा सगळा भस्माचा प्रभाव आहे.' श्रौत असो वा स्मार्त असो, कोणतेही कर्म करतांना भस्म धारण करणे आवश्यकच असते. त्याची आवड निर्माण व्हावी म्हणून भस्ममाहात्म्याचे पूर्व इतिहासासहित वर्णन करीत आहेत. पूर्वीच्या काळी वेदांनी गौरविलेले वामदेव महर्षि,५३.

**वने चचार तं प्रात्तुमागतो ब्रह्मराक्षसः । स्पर्शमात्रात्प्रशान्तोऽभूज्ज्ञाताऽखिलनिजोद्भवः ।।५४।।**

**।। ब्रह्मराक्षस उवाच ।।**

**प्राक्श्रीमत्तोऽस्मि राट्कामी ब्राह्मणाद्यन्तजातिजाः । भुक्ताः श्रेष्ठाः स्त्रियोऽल्पाश्च सहैकैकामनन्तशः ।।५५।।**
**हठाद्दानादिनानीय भुक्ता मद्राष्ट्रसंस्थिताः । नरा राष्ट्रान्तरं जग्मुः सस्त्रीका दोषकातराः ।।५६।।**
**ततो रुग्णस्य मे राज्यमाक्रान्तं शत्रुभिस्ततः । कृच्छ्रात्प्रेत्य मया भुक्ता पितृभिः सह दुर्गतिः ।।५७।।**

तं प्रात्तुं ब्रह्मराक्षसः आगतः। (सः वामदेवस्य अङ्ग) स्पर्शात् प्रशांतो अखिल+निज+उद्भवः ज्ञाता अभूत्।'५४। ब्रह्मराक्षस उवाच। 'प्राक् श्रीमत्तः कामी राट् अस्मि। ब्राह्मण+आदि+अंत्य+जातिजाः श्रेष्ठाः अल्पाः च स्त्रियाः एक+एकाम् सह अनन्तशः भुक्ताः।५५। हठात् दानादिना आनीय भुक्ताः। मत्+राष्ट्र+संस्थिताः नराः दोष+कातराः सस्त्रीकाः राष्ट्र+अंतरं जग्मुः।५६। ततः मे रुग्णस्य राज्यं शत्रुभिः आक्रान्तम्। ततः कृच्छ्रात् प्रेत्य मया पितृभिः सह दुर्गतिः भुक्ता।५७।

एकदां गहन वनात संचार करीत असताना त्यांना खाण्यासाठी एक ब्रह्मराक्षस त्यांच्यावर धांवून आला. पण त्यांचा अंगस्पर्श होतांच त्याचा सगळा त्वेष जाऊन तो एकदम शांत झाला. तसेच त्याला आपल्या सर्व पूर्वजन्मांची स्मृतीही आली.५४. ब्रह्मराक्षस वामदेवांना सांगूं लागला. 'पूर्वजन्मी मी संपत्तीने माजलेला कामासक्त असा राजा होतो. ब्राह्मणापासून अगदी हीनयातीत जन्मलेल्या, प्रौढ, अल्पवयीन, वयांतही न आलेल्या स्त्रियांचा मी भोग घेतला. एकदा भोगून झाल्यावर मग त्यांची विचारपूसही केली नाही.५५. पैशांनी वगैरे त्या आल्या नाहीत तर बलात्काराने मी धरून आणून त्यांचा उपभोग घेत असे. त्यामुळे माझ्या राज्यांतील लोक हा जातिसंकराचा दोष टाळण्यासाठी म्हणून आपापल्या स्त्रियांना घेऊन परराष्ट्रांत जाऊन राहिले.५६. पुढे मी व्याधिग्रस्त झालो असता शत्रूंनी माझे राज्य हिरावून घेतले. मला कष्टप्रद मरण आले. मृत्यूनंतर मला माझ्या पितरांसह नरकवास भोगावा लागला.'५७.

**प्रेतो व्याघ्रश्चाजगरः सालावृक उ सूकरः । शरठः श्वा क्रोष्टुमृगौ कुक्कुटः कपिचिल्लकौ ।।५८।।**
**नकुलः काक ऋक्षश्च कुक्कुटः खर ओतुकः । भेकः कूर्मो मत्स्य आखुर्घूको हस्तीह राक्षसः ।।५९।।**
**एता योनीर्मया भुक्ताः कृच्छ्रात्क्षुत्तृट्प्रपीडितः । त्वामत्तुमागमन् सद्यः शान्तो जातोऽस्म्यदः कथम् ।।६०।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**अङ्गे भस्मास्ति तत्स्पर्शाज्ज्ञानं जातं तवादितः । तन्माहात्म्यमिदं यत्तु सदा प्रीत्या शिवो दधौ ।।६१।।**
**पुरैको द्राविडे विप्र औपपत्ये हतो बहिः । त्यक्तस्तत्रैव भस्माक्त-श्वस्पर्शाद्भस्मभूषितः ।।६२।।**

'प्रेतः, व्याघ्रः, अजगरः, सालावृकः उ सूकरः, शरठः, श्वा, क्रोष्टु+मृगौ, कुक्कुटः, कपि+चिल्लकौ,।५८। नकुलः, काकः, ऋक्षः, च कुक्कुटः खरः, ओतुकः, भेकः, कूर्मः, मत्स्यः, आखुः, घूकः, हस्ती, इह राक्षसः।५९। एता योनीः मया कृच्छ्रात् भुक्ताः। सद्यः क्षुत्+तृट्+प्रपीडितः त्वां अत्तुं आगमन् शान्तः जातः अस्मि। अदः कथम्?'६०। वामदेव उवाच। 'अङ्गे भस्म अस्ति। तत्+स्पर्शात् तव आदितः ज्ञानं जातम्। इदं तत्+माहात्म्यं यत् तु शिवः सदा प्रीत्या दधौ।६१। पुरा द्राविडे एकः विप्रः औपपत्ये हतः बहिः त्यक्तः। तत्र एव भस्माक्त+श्व+स्पर्शात् (सः) भस्मभूषितः।६२।

पिशाच, वाघ, अजगर, खोकड, डुक्कर, सरडा, कुत्रा, कोल्हा, कोंबडा, वानर, घार,५८. मुंगूस, कावळा, अस्वल, रानकोंबडा, गाढव, मांजर, बेडूक, कासव, मासा, उंदीर, घुबड, हत्ती आणि शेवटी आत्तांचा हा ब्रह्मराक्षस,५९. इतक्या योनींत जन्मून मला कष्ट भोगावे लागले. तहान-भुकेने कासावीस होऊन आज मी तुम्हांला खाण्यासाठी धांवून आलो असता मी एकदम शांत झालो. हे असे कसे झाले?६०. वामदेव त्याला म्हणाले, 'माझ्या अंगावर जे भस्म आहे त्याच्या स्पर्शामुळे (तूं शांत होऊन) तुला सर्व पूर्वीचे ज्ञान झाले. त्या भस्माचेच हे माहात्म्य आहे जे साक्षात् भगवान् शंकर सदा प्रेमपूर्वक धारण करतात.६१. पूर्वी द्रविड देशामध्ये एक ब्राह्मण व्यभिचारावरून झालेल्या भांडणांत मारला गेला व त्याला गावाबाहेर टाकण्यांत आले. तिथे भस्माने माखलेल्या कुत्र्याच्या स्पर्शाने ते भस्म त्याच्या शरीराला लागले.६२.

**असून्जहौ तदा प्राप्तान्याम्यान्दूतान्निवार्य तम् । भस्मदग्धमलं शैवा दूता निन्युः शिवान्तिकम् ।।६३।।**

**।। राक्षस उवाच ।।**

**एवं चेद्भस्ममाहात्म्यं तत्स्वीकर्तुं समुत्सहे । तन्निर्माणप्रकारं मे शंस धार्यं कथं च तत् ।।६४।।**
**प्राग्ब्रह्मभ्योऽर्पिता वार्ता वाप्याद्या निर्जलस्थले । रचितास्तत्फलं त्वेतत्पापान्ते तव दर्शनम् ।।६५।।**

**।। वामदेव उवाच ।।**

**त्र्यक्षं सायुधपङ्क्तिहस्तमहिसत्सूत्रं शिवं श्वेतभं, पञ्चास्यं च कपर्दिनं स्मितमुखं वैय्याघ्रचर्माम्बरम् ।**
**चार्वम्बान्वितमिन्दुभालमु शिरोगङ्गं गणाद्यन्वितम्, स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमारमुनिराण्नत्वाऽब्रवीत्प्राञ्जलिः ।।६६।।**

असून् जहौ। तदा प्राप्तान् याम्यान् दूतान् निवार्य शैवाः दूताः तं भस्म+दग्ध+मलं शिव+अन्तिकं निन्युः।'६३। राक्षस उवाच। 'एवं भस्म+माहात्म्यं चेत् तत् स्वीकर्तुं समुत्सहे। तत्+निर्माण+प्रकारं, तत् च कथं धार्यं मे शंस।'६४। प्राक् ब्रह्मभ्यः वार्ता अर्पिता, निर्जल+स्थले वापी+आद्याः रचिताः। एतत् पाप+अन्ते तव दर्शनं तत्+फलम् (अस्ति)।'६५। वामदेव उवाच। 'त्रि+अक्षं स+आयुध+पंक्ति+हस्तं अहि+सत्+सूत्रं, श्वेतभं, पञ्च+आस्यं, कपर्दिनं च स्मित+मुखं, वैयाघ्र+चर्म+अम्बरं, चारु+अम्बा+अन्वितं, इन्दु+भालं उ शिरो+गङ्गं, गण+अन्वितं शिवं स्वस्थं प्रेक्ष्य सनत्कुमार मुनि+राट् नत्वा प्राञ्जलिः अब्रवीत्।'६६।

भस्मामुळे त्याची पापे धुतली गेल्याने, त्याला न्यायला आलेल्या यमदूतांना परतवून शिवदूतांनी त्याला शिवलोकांत नेले.६३. ब्रह्मराक्षस म्हणाला, एवढं भस्माचे माहात्म्य ऐकून मलाही ते धारण करावे अशी स्फूर्ती होत आहे. ते कसे तयार करावे आणि कसे लावावे ते मला आपण सांगा.६४. पूर्वी मी ब्राह्मणांच्या उपजीविकेसाठी भूमी दान केली होती; तसेच पाणी नसलेल्या ठिकाणी विहिरी खणविल्या होत्या. पापाचा भोग सरल्यावर झालेले आपले दर्शन हे त्याचेच फळ आहे.६५. वामदेव सांगूं लागले, 'त्रिनेत्र, आयुधे धारण केलेल्या दहा भुजा, नागाचे यज्ञोपवीत धारण केलेल्या शुभ्र धवल वर्णाच्या, पंचमुखी, कवड्यांनी सुशोभित, सुहास्यवदन, व्याघ्राजिन पांघरलेल्या, वामांकी त्रैलोक्यमोहिनी पार्वतीमातेला घेतलेल्या कपाळावर चंद्र मिरविणाऱ्या तसेच शिरी गंगा धारण केलेल्या, गणसमूहांनी वेष्टिलेल्या भगवान शिवांना प्रसन्नचित्त पाहून मुनिश्रेष्ठ सनतकुमार नमस्कार करून हात जोडून त्याना म्हणाले.६६.

जयेश्वरानन्त हराज शंभो जगन्निदानाल्पकसाधनं नः ।
मुक्त्यै शिवोपादिश दुष्कराणि प्रोक्तानि सर्वाणि तु साधनानि ।।६७।।

।। शिव उवाच ।।

दर्शनात्परिहृत्याघं भुक्त्वा शं विधिवद्धृतेः । भस्मनः पुरुषोऽह्नाय जीवन्मुक्तो भवत्यलम् ।।६८।।
यज्ञोत्थं वा करीषोत्थमग्निरित्यादिमन्त्रितम् । धार्यं त्र्यायुषमित्येतैरङ्गुलीभिः प्रतिस्थलम् ।।६९।।
त्रिपुण्ड्रा भ्रूसमा रेख्या वर्णादिस्मृतिपूर्वकम् । त्र्यर्णास्त्रिदेवास्त्रिगुणास्त्रिरात्मानस्त्रिशक्तयः ।।७०।।

'हे हर! हे अज! हे अनंत! हे शंभो! हे जगन्निदान! नः मुक्त्यै अल्पक+साधनं उपादिश। हे शिव! सर्वाणि प्रोक्तानि साधनानि तु दुष्कराणि।'६७। शिव उवाच। 'दर्शनात् अघं परिहृत्य, विधिवत् धृतेः भस्मनः शं भुक्त्वा पुरुषः अह्नाय अलं जीवन्मुक्तः भविष्यति।६८। यज्ञ+उत्थं वा करीष+उत्थं 'अग्निः' इत्यादि मंत्रितं, 'त्र्यायुषं' इत्येतैः अङ्गुलीभिः प्रतिस्थलं धार्यम्।६९। वर्णादि+स्मृति+पूर्वकं भ्रूसमा त्रिपुंड्रा रेख्या। त्रि+अर्णाः, त्रि+देवाः, त्रि+गुणाः, त्रिः+आत्मनः, त्रि+शक्तयः,।७०।

'हर, अनंत, अज, शंभो, हे जगत्कारण, आम्हांला या जन्म-मरणरूपी संसारापासून मुक्त होण्यासाठी एखादे छोटे आणि सोपे असे साधन सांगा. आतांपर्यंत आपण उपदेशिलेली सर्व साधने खरोखर दुष्कर आहेत.६७.

**भस्ममाहात्म्य -** भगवान शंकर म्हणाले, 'भस्माच्या केवळ दर्शनाने पापांचा परिहार करून, ते विधिपूर्वक धारण केल्याने सुख भोगून पुरुषाला शीघ्रच जीवन्मुक्त करते. अधिक काय सांगावे?'६८. यज्ञापासून झालेले किंवा जाबालांनी सांगितलेल्या पद्धतीने वाळलेल्या शेण्या जाळून केलेले भस्म उत्तम होय. ते 'अग्निरिति भस्म..' इत्यादि मंत्राने अभिमंत्रावे आणि 'त्र्यायुषं' इत्यादि मंत्रांनी तीन बोटांनी कपाळादि ठिकाणांवर लावावे.६९. भिवईच्या रुंदीच्या तीन रेघा वर्णादींचे स्मरण करून ठिकठिकाणी लावाव्या. 'अ', 'उ', 'म' हे तीन वर्ण (अक्षरे), ब्रह्मा-विष्णू-महेश्वर ह्या तीन देवता, सत्त्व-रज-तम हे तीन गुण, विश्व-तैजस-प्राज्ञ हे तीन अभिमानी (आत्मे), इच्छा-द्रव्य-क्रिया,७०.

**त्रिछन्दसस्त्रिलोकास्त्रि-वेदास्त्रिषवणाः स्मृताः । सर्वाघहृत्सदा सर्वैर्धार्यं तद्विधिवन्नरैः ॥७१॥**
**भक्त्याज्ञेनापि तद्धार्यं तारकं नापरं ह्यतः । परस्त्रीगोनिन्दकोऽसन् क्षेत्रहृत्परपीडकः ॥७२॥**
**गृहदाही मृषावादी खलो वेदरसक्रयी । नीचाच्च दुष्प्रतिग्राही वृषलीविधवादिगः ॥७३॥**

त्रि+छंदसः, त्रिलोकाः, त्रि+वेदाः, त्रि+षवणाः स्मृताः। तत् सर्व+अघ+हृत् सर्वैः नरैः सदा विधिवत् धार्यम्।७१। अज्ञेन अपि तत् भक्त्या धार्यम्। अतः न अपरं तारकं (अस्ति) हि। (पर+स्त्री+गः, निन्दकः, क्षेत्र+हृत्ट पर+पीडकः।७२। (परस्त्रीगः, निन्दकः, असन्, क्षेत्रहृत्, परपीडकः), गृहदाही, मृषावादी, खलः, वेद+रस+क्रयी, नीचात् दुः+प्रतिग्राही, वृषली+विधवा+आदि+गः,।७३।

ह्या तीन शक्ती, गायत्री-उष्णिक्-अनुष्टुभ हे तीन छंद, भूः-भुवः-स्वः हे तीन लोक, ऋग्वेद-यजुर्वेद-सामवेद हे तीन वेद आणि प्रातः-माध्याह्न-सायं हे तीन सवन आहेत. सर्व पापहर अशा भस्माचे सर्व वर्णाच्या तसेच सर्व आश्रमाच्या स्त्रीपुरुषांनी आणि विधवादींनीही - मनुष्यमात्रांनी, विधिपूर्वक धारण करावे.७१. अगदी अज्ञानी माणसानेही ते भक्तीपूर्वक लावावे; कारण ह्याच्याइतके तारक दुसरे साधनच नाही.७२.

**जाणून करणाऱ्याला अधिक फळ -** इतके आवर्जून सांगितल्यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो की केवळ भस्म लावण्याचेच एवढे पुण्य असेल तर मग ज्ञानाचे काय प्रयोजन! हिरडा खाल्ल्याने त्याचे ज्ञान असले वा नसले तरी विरेचन होतेच. त्याचे असे समाधान आहे की ज्याला ज्ञान असते त्याला अधिक लाभ होतो. पद्मरागादि मण्यांचा विक्रय करतांना भिल्लाला वगैरे जेवढे पैसे मिळतात त्याहून मण्यांचे ज्ञान असलेल्या सराफाला अधिक लाभ होतो हे आपण पाहतोच ना? छांदोग्यांत (१:१:१०) सांगितले आहे की ज्ञानपूर्वक, श्रद्धेने आणि ध्यानयोगाने केलेले कर्मच अधिक वीर्यशाली होते. जाणून कर्म करावे अशी श्रुतीही आहे. यासाठी जाणून - समजून केलेल्या कर्माचे फल उत्कृष्ट होते. हा नियम सर्वच कर्मांना लागूं आहे.

'परस्त्रीगामी, निन्दक, अधर्माचारी,जमीन लुबाडणारा, घराला आग लावणारा, खोटा आरोप करणारा, दुष्ट, वेद आणि रस (विष, मद्य आदि) यांचा विक्रय करणारा, हीनाकडून निषिद्ध दान घेणारा, कुमारिका किंवा विधवा स्त्रियांशी संग करणारा,७३.

**ज्ञानाज्ञानकृताऽघोपि मुक्तः स्याद्भस्मधारणात् । भस्मत्रिपुण्ड्ररुद्राक्षैः स्वः पूज्यो ना पुमर्थदैः ।।७४।।**
**सहस्रप्राक्परोत्पत्ति-दोषघ्नं व्याधिनाशनम् । तीर्थाप्लुतिजपाधिक्य-फलदं भस्मधारकम् ।।७५।।**
**स्वरादिलोकं नीत्वान्ते शैवे स्थापयति ध्रुवम् । सनत्कुमार सुलभं तारकं भस्मधारणम् ।।७६।।**
**एवं सनत्कुमारेश-संवादस्ते मयोदितः । तस्मात्त्वं परिधत्स्वाङ्गे भस्मेत्युक्त्वा ददौ मुनिः ।।७७।।**
**राक्षसोऽपि तदादाय भस्माङ्गे विधिवद्दधौ । तदैव राक्षसीं हित्वा तनुं मुक्तोऽभवत्क्षणात् ।।७८।।**

ज्ञान+अज्ञान+कृत+अघः अपि भस्मधारणात् मुक्तः स्यात्। पुं+अर्थदैः भस्म+त्रिपुण्ड्र+रुद्राक्षैः ना स्वः पूज्यः।७४। भस्म+धारकं सहस्र+प्राक्+पर+उत्पत्ति+दोष+घ्नं, व्याधि+नाशनं, तीर्थ+आप्लुति+जप+आधिक्य+फलदम्।७५। स्वः+आदि+लोके नीत्वा अन्ते शैवे ध्रुवं स्थापयति। (हे) सनत्कुमार भस्मधारणं सुलभं तारकं (च)।७६। एवं सनत्कुमार-ईश+संवादः ते मया उदितः। तस्मात् त्वं भस्म अङ्गे परिधत्।' इति उक्त्वा मुनिः (भस्म) ददौ।७७। 'राक्षसः अपि तत् भस्म आदाय विधिवत् अङ्गे दधौ। तदा एव (सः) राक्षसीं तनुं हित्वा क्षणात् मुक्तः अभवत्।७८।

जाणून किंवा अजाणतां पाप करणारे अंगाला भस्म लावल्याने त्या पापापासून मुक्त होतात. मानवाला पुरुषार्थांची (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) प्राप्ती करून देणाऱ्या भस्माचे त्रिपुंड्र तसेच रुद्राक्ष धारण करणारे मानव स्वर्गांतही पूज्य होतात.७४. भस्म धारण करणाऱ्याच्या पूर्वापर हजार जन्मांचे दोष नष्ट करून, तसेच त्याच्या व्याधींचाही नाश करून, तीर्थस्नान, जप इत्यादिकांपेक्षाही अधिक फळ भस्म देते.७५. स्वर्गादि लोकांत नेऊन शेवटी निरतिशयानंदरूप शैवलोकांत शाश्वत पुनरावृत्तीरहित ठेवून देणारे हे भस्मधारण तारक तर आहेच, पण तुला हवे तसे सुलभही आहे.७६. हे राक्षसा, असा हा सनत्कुमार आणि महादेव यांचा संवाद मी तुला सांगितला. तरी तूं हे भस्म स्वतःच्या शरीराला लावून घे.' असे म्हणून वामदेव मुनींनी त्याला आपल्याजवळचे भस्म दिले.७७. तेव्हां ब्रह्मराक्षसानेही ते भस्म घेऊन मंत्रासह अंगावर धारण केले. त्याच वेळी त्याने त्या राक्षस देहाचा त्याग केला आणि तत्क्षणी तो मुक्त झाला.७८.

**तदैवाप्तं विमानं स तेनागात्तत्क्षणाद्दिवम् ।**
**तस्मान्मुने भस्मशक्तिं ज्ञात्वाङ्गे धेहि मुच्यसे ।।७९।।**
**एवं गुरूक्तं ह्यभिगृह्य हृष्टो भक्त्योपसंगृह्य तमाज्ञयागात् ।**
**त्रिविक्रमोऽन्येऽपि हि तत्प्रमाणं मत्वोत्तमं चेरुरथो तथैव ।।८०।।**
**एवं क्रियाविपाकोऽयमीदृक्श्रुतिभयङ्करा ।**
**दण्डधृग्यातना तस्माच्छ्रेय एव सदाचरेत् ।।८१।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मविपाको नाम पञ्चदशोऽध्यायः ।।१५।।**

तदा एव विमानं आप्तम्। तेन सः तत् क्षणात् दिवं अगात्। तस्मात्, हे मुने, भस्म+शक्तिं ज्ञात्वा अङ्गे धेहि। मुच्यसे।'७९। एवं गुरु+उक्तं अभिगृह्य हृष्टः त्रिविक्रमः तं उपसंगृह्य आज्ञया अगात्। अन्ये अपि हि अथः तत् प्रमाणं उत्तमं मत्वा तथा एव चेरुः।८०। एवं क्रिया+विपाकः दण्ड+धृक्+यातना ईदृक् श्रुति+भयंकरा। तस्मात् श्रेय एव सदा आचरेत्।८१।

तात्काळ त्याच्यासाठी विमान आले आणि त्यात बसून तो सगेच स्वर्गाला गेला. ही कथा सांगून श्रीगुरू त्रिविक्रमांना म्हणाले, 'हे मुनिराज, हे भस्माचे सामर्थ्य जाणून ते नित्य शरीरावर धारण करा, म्हणजे मुक्त व्हाल!'७९. हा श्रीगुरूंचा उपदेश श्रवण करून संतोष पावलेल्या त्रिविक्रम स्वामींनी भक्तिपूर्वक त्यांना वंदन केले आणि त्यांची आज्ञा घेऊन कुमसीला गेले. तिथे जमलेले इतरही सद्गुरूंचा हा उपदेश श्रेष्ठतम प्रमाण मानून त्याप्रमाणेच आचार करू लागले.८०. असे हे कर्मविपाक आणि यमयातना ऐकायलासुद्धा भयंकर आहेत. मग भोगायला किती भयानक असतील? छांदोग्योपनिषदांत (५:१०:७) ह्याचे स्पष्ट दिग्दर्शन आहे. जे इथे भूलोकांत गलिच्छ आचरण करतात ते श्वान-सूकर-चांडालादि गलिच्छ योनींत जन्म घेतात. जे इथे चांगले आचरण करतात त्यांना तशाच चांगल्या योनीत (ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य) जन्म मिळतो. तरी श्रेयाचे म्हणजे सत्कर्माचेच आचरण मनुष्याने करावे. गरुडपुराणाच्या

प्रतिपादनानुसार (प्रेतकल्प, धर्मकांड ११:१२) स्वर्ग आणि मोक्ष या दोन्हींचे साधन असणारा हा मनुष्यजन्म लाभूनही जे त्यातले एकही साधत नाहीत ते स्वतः घोर वंचना करतात.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला दुसरा आणि प्रथमपासून पंधरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। षोडशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**नमस्ते ब्रूहि चरितं हरेरद्भुतकर्मणः । शृण्वतोऽपि न मे तृप्तिरमृतं पिबतो यथा ।।१।।**

नामधारक उवाच। (भो सिद्ध) ते नमः। अद्भुत+कर्मणा हरेः चरितं ब्रूहि। शृण्वतः अपि मे न तृप्तिः यथा अमृतं पिबतः।१।

श्रीगणेशाय नमः। *सोळाव्या अध्यायीं सतीला श्रीगुरु स्त्रियांचे धर्म उपदेशिती। सर्वेचि करुणाघन तियेच्या मृत पतीला जिवंत करिती।।१।।*

**श्रेय आणि प्रेय** - मागील अध्यायाच्या शेवटी सदा श्रेयाचीच कास धरावी असे म्हटले आहे. हे श्रेय म्हणजे काय ते कठोपनिषदांत (१:२:१ -१:२:४) यमाने नचिकेताला केलेल्या उपदेशाच्या आरंभीच स्पष्ट केले आहे. श्रेय म्हणजे कल्याणाचा मार्ग. याउलट प्रेय म्हणजे ऐंद्रिय सुखाची वाट. विचारी माणूस प्रेयाच्या मागे न लागतो श्रेयाचा अंगीकार करतो. यांचे परिणाम परस्परविरोधी आहेत. श्रेयाची वाट चित्तशुद्धीद्वारा ज्ञानाकडे आणि अंतिम कल्याणाकडे जाते. ह्याला यमाने विद्या असे नाव दिले आहे. तर अविद्या अज्ञानांत रुतवणाऱ्या प्रेयाकडे नेते. ऐहिक आणि पारलौकिक विषयभोगांचे साधनभूत कर्म म्हणजे अविद्या; तर निरतिशय आनंदाचा लाभ करून देणारी विद्या म्हणजे ज्ञान. ह्या ज्ञानाचे स्वरूप आपण ज्ञानकांडात पाहिले आहे. मात्र हे ज्ञान विषयवासनांनी कलुषित चित्तांत सहसा स्फुरत नाही. त्या चित्ताच्या शुद्धीसाठी शास्त्रविहित नित्य आणि नैमित्तिक कर्म निष्काम बुद्धीने करणे आवश्यक आहे. त्या कर्माचे निरूपण पुढे तीन अध्यायांत केले आहे. त्यापूर्वी दोन अध्यायांत स्त्रियांचे धर्म निरूपिले आहेत.

नामधारकांनी सिद्धमुनींना नमस्कार करून विनंति केली की, 'अद्भुत चमत्कारांनी भरलेले श्रीगुरूंचे चरित्र आपण मला पुढे सांगा. ते कितीही ऐकले तरी माझे मन तृप्त होत नाही. जसे अमृत पिणाऱ्याला ते अधिकाधिक हवेच असते तसे!'१.

**।। सिद्ध उवाच ।।**

**सत्पृष्टं वत्स धन्योऽसि भवाब्धिर्लीलया जितः । चित्तं ते चरितैर्विद्धं हरेस्तेनास्मि तोषितः ।।२।।**
**को ब्रूयाद्भगवल्लीलां कति चित्राणि वच्मि ते । मूको ब्रूते प्रेक्षतेऽन्धो मृतो जीवति यद्दृशा ।।३।।**
**शृण्वेको माहुरे विप्रो गोपीनाथो धनी मृताः । तत्पुत्रा बहवोऽथैको जीवितो दत्तसेवया ।।४।।**
**दत्तप्रसादाच्चिरजीवितं सुतं नाम्नाकरोद्दत्तमिति द्विजातिजः ।**
**कान्तः सुलक्ष्मा मतिमान्सुसात्त्विकः पित्रोर्मृतार्भाकविनाश्यवर्धत ।।५।।**

सिद्ध उवाच। '(हे) वत्स, सत् पृष्टम्। धन्यः असि। भव+अब्धिः लीलया जितः। ते चित्तं हरेः चरितैः विद्धं तेन तोषितः अस्मि।२। भगवत्+लीलां कः ब्रूयात्? कति चित्राणि ते वच्मि। यत् दृशा मूकः ब्रूते, अन्धः प्रेक्षते, मृतः जीवति।३। शृणु। माहुरे एको धनी विप्रः गोपीनाथः। बहवः तत्+पुत्राः मृताः। अथ एकः दत्त+सेवया जीवितः।'४। दत्त+प्रसादात् चिर+जीवितं सुतं द्विजातिजः नाम्ना दत्त इति अकरोत्। कान्तः सुलक्ष्मः मति+मान् सुसात्त्विकः पित्रोः मृत+अर्भ+अक+विनाशी अवर्धत।५।

सिद्ध म्हणाले, 'वा! उत्तम प्रश्न विचारलास. यमाने जसे सोन्याची साखळी असलेल्या प्रेयाला सोडून श्रेयाची कांस धरल्याबद्दल नचिकेत्याचे अभिनंदन केले तसेच तुझे करायला हवे. तू खरेच धन्य आहेस! श्रवणभक्तीचा आदर करून तू हा दुस्तर जन्ममरणरूपी संसार लीलया जिंकला आहेस. श्रीगुरूंच्या चरित्राने तुझ्या मनाचा वेध घेतला आहे हे पाहून मला खूप आनंद वाटतो.२. भगवंताच्या लीला पूर्णतया कोण बरे सांगू शकेल? कुणीच नाही. कांही आश्चर्यकारक घटना मी तुला सांगतो. त्या श्रीगुरूंच्या केवळ कृपादृष्टीनेच मुका बोलू लागतो, आंधळा पाहू लागतो, एवढेच काय मेलेलासुद्धा जिवंत होतो.'३. तर ऐक. माहूर गांवी एक गोपीनाथ नावाचा धनाढ्य ब्राह्मण होता. त्याचे बरेच पुत्र लहानपणीच मरण पावले. मग श्रीदत्तप्रभूंच्या उपासनेने त्याचा एक मुलगा जगला.४. दत्तप्रभूंच्या कृपाप्रसादाने जगलेल्या त्या मुलाचे नाव ब्राह्मणानी 'दत्त' असेच ठेवले. तो सुंदर, तेजस्वी, सुलक्षणी, बुद्धिमान मुलगा मातापितरांचे आधीच्या मुलांच्या मृत्यूचे दुःख हलके करीत त्याच्या घरी वाढू लागला.५.

**सुसंस्कृतस्यास्य विधेः सुरूपिणी लब्धा वधूर्धीगुणशीलशालिनी ।**
**रतिः स्मरस्येव परस्परोत्थितमासीत्तयोः प्रेम रथाङ्गनामवत् ।।६।।**
**सरूपौ सुरूपौ स्वयोर्मन्यमानौ वियोगं कुयोगं क्षणं धर्मदक्षौ ।**
**उभौ तौ स्मरन्तौ सदाऽन्योऽन्यभद्रं न तन्द्रा न निद्रा पतिप्रेम्णि साध्व्याः ।।७।।**

अस्य सुसंस्कृतस्य विधेः सुरूपिणी धी+गुण+शालिनी वधूः लब्धा। तयोः रति+स्मरस्य इव परस्पर+उत्थितं प्रेम रथांगनामवत् आसीत्।६। तौ उभौ सरूपौ सुरूपौ स्वयोः वियोगं कुयोगं मन्यमानौ, धर्मदक्षौ, सदा अन्यः+अन्य+भद्रं स्मरन्तौ। साध्व्याः पति+प्रेम्णि न तन्द्रा न निद्रा (आसीत्)।७।

यथाकाल त्याचे मौंजीबंधनादि संस्कार झाले. त्याच्या सुदैवाने त्या सुंदर, बुद्धिमती आणि गुणवान् अशी पत्नीही लाभली. त्या दंपतीमध्ये रती आणि मदन यांच्यासारखे प्रेम निर्माण झाले आणि ते चक्रवाक पक्ष्यांच्या प्रेमाप्रमाणे दृढावले.६. ते दोघे पतिपत्नी सुंदर आणि परस्परांना अनुरूप असे होते. एकमेकांचा किंचितही वियोग त्यांना सहन होत नसे. धर्माचरणांत ते उभयतां दक्ष होते आणि एकमेकांचे हित जिह्वाळ्याने जपत होते. त्या साध्वीला तर पतीच्या प्रेमापुढे न झोप, ना थकवा येत असे. इथे **सरूपौ** शब्दाचा अर्थ सारख्या रूपाचे असा घेतला तर याज्ञवल्क्यस्मृतीतल्या विवाहप्रकरणांतील(५२) 'वधू वयाने आणि अंगाने वरापेक्षा लहान (*यवीयसी*) असावी' या वचनाचा विरोध होतो. म्हणून सरूपौचा अर्थ अनुरूप असाच होतो.७.

**लेपोऽत्युष्ण इवानिलोऽनलसमः शीतांशुरुष्णांशुवच्छय्या वृश्चिकवत्सुमस्रगहिवद्भूषाः समाः कण्टकैः ।**
**वाङ्माधुर्यमपि प्रदीपनसदृक्स्वाद्वन्नमप्युत्कटु प्रेष्ठे त्वन्तरिते क्षणं दृढतरां साध्व्या अभूत्सर्वदा ।।८।।**
**एवं सतोश्चापरिहार्यशोषवान् भर्ता सुसाम्यासहनाद्विधेरभूत् ।**
**क्षीणोऽरुचिः श्वासकफार्दितोऽनिशं दुःखोज्झितस्वापभुजिः सुमन्दवाक् ।।९।।**

प्रेष्ठे क्षणं अन्तरिते तु साध्व्या लेपः अति+उष्णः, अनिलः अनलसमः, शीत+अंशु उष्ण+अंशुवत्, शय्या वृश्चिकवत्, भूषाः कण्टकैः समाः, वाक्+माधुर्यं अपि प्रदीपनसदृक्, स्वादु+अन्नं अपि उत्कटु सर्वदा अभूत्। ८। एवं सतोः विधेः सुसाम्य+असहनात् भर्ता अपरिहार्य+शोषवान् अभूत्। क्षीणः अरुचिः अनिशं श्वास+कफ+अर्दितः दुःख+उज्झित+स्वाप+भुजिः, सुमन्द+वाक् (अभूत्)।९।

पतीच्या क्षणभरही विरहाने त्या साध्वीला गार लेपसुद्धा पोळत असे; शीतल वायूसुद्धा अग्निसारखा दाहक वाटे; चंद्राच्या चांदण्याचेही चटके बसत; मृदू शय्याही विंचवासारखी दंश करीत असे; अलंकार काट्यासारखे टोचत असत; मधुर भाषणसुद्धा तिच्या चित्ताचा क्षोभ करी; एवढेच काय, चविष्ट अन्नही अति तिखट लागे.८. असा त्या दंपतीचा सुखाचा संसार जणू दैवाला पाहवला नाही. पतीला असाध्य असा क्षय रोग झाला. तो अत्यंत क्षीण झाला, सतत श्वास आणि दमा यांनी बेजार झाला. या दुःखामुळे त्याची झोप आणि आहार अत्यंत कमी झाले.९.

**भुङ्क्ते यथान्नं स सती तथान्नं शेतेऽपि यावत्स सती तु तावत् ।**
**कृशोऽपि यद्वत्स सती तु तद्वत् छायापरेवास्य पतिव्रताऽभूत् ।।१०।।**
**वैद्योऽन्तिके तस्य कुगन्धशङ्कया न याति साध्वी सुमना न तं जहौ ।**
**भेजे पतिं स्नानसुगन्धिलेपनैः पादाङ्गसंवाहनभेषजार्पणैः ।।११।।**

सः यथा अन्नं भुङ्क्ते, तथा सती अन्नं (भुङ्क्ते)। (सः) यावत् शेते सती तु तावत् (शेते)। यद्वत् सः कृशः सती तु तद्वत् (कृशा)। पतिव्रता अस्य अपरा छाया अभूत्।१०। वैद्यः कुगंध+शंकया तस्य अंतिके न याति। सुमना साध्वी तं न जहौ। पतिं स्नान+सुगंधि+लेपनैः पाद+अङ्ग+संवाहन+भेषज+अर्पणैः भेजे।११।

**क्षयाची लक्षणे -** इथे श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत चरकसंहितेतील (निदानस्थान ६:१५-१७) क्षयाच्या अकरा लक्षणांचा निर्देश केला आहे. डोके जड पडणे, दम लागणे, खोकला, स्वर कांपरा होणे, कफ पडणे, रक्त पडणे, कुशीच्या बरगड्या, खांदे व फऱ्याचे हाड यांच्या वेदना, ज्वर, अतिसार आणि अन्न गोड न लागणे. अशक्त, क्षीण, रक्त आणि स्नायू कमी झालेला रोगी. क्षयाची लक्षणे सौम्य असली किंवा धोकाजनक नसली तरी तो अरिष्टकारीच मानावा. औषधोपचाराचा विशेष प्रभाव पडणार नाही असे तिथेच सांगितले आहे. यासाठी अपरिहार्य क्षय असे म्हटले आहे.

अशा स्थितीत त्या पतिव्रतेने केलेल्या पतीचे मार्मिक वर्णन श्रीस्वामिमहाराजांनी केले आहे. तो जेवढे अन्न घेत असे तेवढेच ती सती घेई. त्याला जितका वेळ झोप येई तितकाच वेळ तीही झोपत असे. तो जितका रोड झाला तितकीच ती सतीही रोडावली. एकूण काय तर ती साध्वी त्याची जणू दुसरी सावलीच होऊन गेली!१०. त्याच्या शरीराच्या दुर्गंधीमुळे वैद्यही त्याच्याजवळ जाण्याचे टाळू लागले. पण त्या थोर मनाच्या सतीने त्याला सोडले नाही. त्याला स्नान घालून त्याच्या शरीरावर सुगंधी लेप लावू लागली. त्याचे पाय, अंग चुरून देऊ लागली. त्याला वेळच्या वेळी औषध देत असे.११.

**शान्त्यार्चनैर्होमजपैश्च भेषजैर्दानैर्न यक्ष्मा किमपि व्यहीयत ।**
**श्यामामुखेन्दुं परिपूर्णमुद्ग्रसन्मन्दस्मितज्योत्स्नमभूत्परो ग्रहः ।।१२।।**

अर्चनैः, होम+जपैः, भेषजैः, दानैः, शान्त्या च यक्ष्मा किं अपि न व्यहीयत्। मन्द+स्मित+ज्योत्स्नं श्यामा+मुख+इन्दुं परिपूर्णं उद्ग्रसन् (यक्ष्मा) परः ग्रहः अभूत्।१२।

*'पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण बाधते। तच्छान्तिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः'* या मनुस्मृतीच्या वचनानुसार पूर्वजन्मी केलेल्या पापापासून उद्भवलेल्या या क्षयरोगाच्या उपशमासाठी देवपूजा, होम, जप, औषधी आणि दान हे उपाय करण्यात आले. पण तो रोग मुळीच हटला नाही. त्याने त्या श्यामेच्या मुखरूपी पूर्णचंद्राची ज्योत्स्नाच असलेले तिचे मंदस्मित राहूप्रमाणे पूर्णतः ग्रासून टाकले. पतीला झालेल्या क्षयरोगाने तिचे मुख म्लान झाले हे उपमालंकाराने सांगितले आहे. **श्यामा** या शब्दाचे दोन अर्थ टीकेत दिले आहे. सोळा वर्षांची बाला आणि उष्णकालांत शीत असणारी आणि शीतकालांत उष्ण असणारी युवती.१२.

इथे अशी एक शंका उपस्थित केली आहे की बृहदारण्यक उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार **क्रियमाण कर्माचे फल** जन्मांतराने मिळते. तेव्हा व्याधीच्या उपशमासाठी केलेल्या देवपूजादि कर्मांचा सध्याच्या जन्मात कसा उपयोग होईल? त्याचे समाधान असे आहे की अत्यंत तीव्र पापाचे किंवा पुण्याचेही फळ ह्याच जन्मात भोगावे लागते. त्यानुसार ह्या जन्मात केलेल्या जपहोमादि कर्मांनी पूर्वजन्माच्या कर्माचा उपशम होऊन आरोग्याचा लाभ होऊ शकतो.

**द्विजं रुजार्तं च तथाविधां वधूं तयोर्न शेकुः पितरौ निरीक्षितुम् ।**
**निवारिता तैरपि सा पतिव्रता न तं जहावर्यमणं प्रभा यथा ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**प्राग्वैरतः कष्टमिदं मयार्पितं धृत्या पितः सात्त्विकयाम्ब जीवितुम् ।**
**साध्वर्हथस्ते सति पूर्ववैर्यहं तन्मां विहायाशु पितुर्गृहं व्रज ।।१४।।**

रुजा+आर्तं द्विजं च तथाविधां वधूं तयोः पितरौ निरीक्षितुं न शेकुः। तैः निवारिता अपि सा पतिव्रता, यथा अर्यमणं प्रभा, तं न जहौ।१३। विप्र उवाच। '(हे) पिता, (हे) अम्ब, मया प्राक्+वैरतः इदं कष्टं अर्पितम्। साधु सात्त्विकया धृत्या जीवितुम्। (हे) सति अहं ते पूर्ववैरी। तत् मां विहाय आशु व्रज।'१४।

रोगाने कष्टलेला तो मुलगा आणि त्याच्या सेवेने तेवढीच कष्टणारी त्याची पत्नी ह्यांच्याकडे पाहणेसुद्धा आईवडिलांना दुःसह झाले. त्यांनी आपल्या सुनेला इतके कष्ट करू नकोस असे सांगूनही पाहिले. पण त्या पतिव्रतेने, सूर्याला जशी त्याची प्रभा, तसे आपल्याला पतीपासून क्षणभरही दूर होण्यास नकार दिला.१३. त्या सर्वांचे क्लेश पाहून तो पुत्र आईवडिलांना म्हणाला, 'मी तुम्हांला हे दुःख देत आहे ते पूर्वजन्मीच्या कांही वैराचा सूडच असावे. तुम्ही आतां उत्तम सात्त्विक धैर्याने ते सहन करून जीवन कंठायचे आहे. मग तो आपल्या पत्नीला म्हणाला, मी तुझा पूर्वजन्मीचा दावेदार आहे. मला दुर्भाग्याला सोडून तू लवकर माहेरी जा.'१४.

### ।। साध्व्युवाच ।।

**नार्हास्म्यनन्यशरणा परिहापितुं ते नन्वर्धसुन्दरशरीरविभागिनीयं ।**
**जीवोऽस्य साधुवपुषोऽस्ति भवान्वियुक्ते जीवे तनोर्ननु भवेत्खलु जीवहत्या ।।१५।।**
**सदा मदास्यं शशिशालि कालिमा कुतो यतो भैधत एवमेव ते ।**
**अकी सुखी यत्र भवत्यवत्यघात् तमीशमीडे स तु देवदेवतः ।।१६।।**
**नमो नमो वां श्वशुरौ मया श्रुतो गुरुः स गन्धर्वपुरेऽस्ति तारकः ।**
**असुप्रियोऽनामयमेति भाति मे सहामुना यास्य उ रोचतेऽपि वाम् ।।१७।।**

साध्वी उवाच। 'ते अनन्यशरणा परिहापितुं न अर्हा। ननु इयं अर्ध+सुंदर+शरीर+विभागिनी। भवान् अस्य साधु+वपुषः जीवः अस्ति। तनोः जीवे वियुक्ते खलु जीवहत्या भवेत्।'१५। सदा मत्+आस्यं शशि+शालि। कालिमा कुतो? यतो ते भा एधत एव। यत्र अकी सुखी भवति सः अघात् अवति। तं ईशं ईडि। स तु देवदेवतः।१६। (हे) श्वशुरौ, वां नमो नमः। मया श्रुतः गन्धर्वपुरे गुरुः अस्ति, सः तारकः। मे भाति असु+प्रियः अनामयं एति। अमुना सह यास्ये, वां रोचते अपि?'१७।

ती सती म्हणाली 'केवळ आपलाच एक आधार असलेल्या ह्या अगतिक स्त्रीचा त्याग उचित नाही. मी आपल्या या सुंदर शरीराची अर्धांगिनी आहे. आपण ह्या माझ्या शरीराचे प्राणच आहांत. देहापासून जीव वेगळा झाला तर ती जीवहत्याच होईल ना?' तिचे हे प्रतिपादन तैत्तिरीय संहितेच्या (६:१:८५) '*अर्धो वा एष आत्मा पत्नीशरीरम्।*' या वचनाशी सुसंगतच आहे.१५. माझे मुख सदैव तेजस्वीच आहे. आपली कांती जोवर वाढती आहे तोवर त्याला कुठलाही डाग लागणार नाही. दुःखी जीवाला सुखी करणारा आणि पापापासून रक्षण करणाऱ्या देवाची आपण स्तुती करू या. तोच सर्व देवांचाही देव आहे.१६. अहो मामंजी, मामी, तुम्हांला वारंवार नमन असो. मी असे ऐकले आहे की गाणगापूर येथे श्रीगुरू (नृसिंहसरस्वती) आहेत. तोच तारणहार आहे. आपल्याला जर रुचत असेल तर मी ह्यांना त्यांच्याकडे घेऊन जाते.१७.

**तावूचतुः क्वापि तव श्रमेण सम्राज्ञि जीवेत स तत्र गच्छ ।**
**श्रुत्वैवमाराच्छ्वशुरौ प्रणम्य तदाज्ञयाऽगात्सह तेन साध्वी ॥१८॥**
**सुखस्थितं मन्थरवाहवाहितं तमन्वगच्छत्पतिमङ्घ्रिचारिणी ।**
**दधौ कराकृष्टधवा गमानत-क्षमेभिभामुत्कुचगण्डकर्शिता ॥१९॥**
**क्रान्तेऽयनेथो कतिचिच्छनैः शनैर्मृत्युं धवोऽगात्स तदैव दैवतः ।**
**सा मर्तुमुत्कापि निवारितेतरैः शुक्तामसीम्लानमुखाम्बुजाऽवदत् ॥२०॥**

तौ ऊचतुः। (हे) सम्राज्ञि, तव श्रमेण सः (यत्र) क्वापि गच्छति तत्र गच्छ। एवं श्रुत्वा श्वशुरौ प्रणम्य तत्+आज्ञया तेन सह साध्वी अगात्।१८। सुख+स्थितं मन्थर+वाह+वाहितं तं पतिं अङ्घ्रि+चारिणी अनु+अगच्छत्। कर+आकृष्ट+धवा गम+आनत+क्षमा इभा+भां उत्कुच+गण्ड+कर्शिता दधौ।१९। कतिचित् शनैः शनैः अयने क्रान्ते तदा एव दैव+तः धवः मृत्युं अगात्। सा मर्तुं उत्का अपि इतरैः निवारिता। शुक्+तामसी+म्लान+मुख+अम्बुजा अवदत्।२०।

सासू-सासरे म्हणाले, 'वेदोक्तीला अनुसरून तू सम्राज्ञीच आहेस (ऋग्वेद १०:८५:४६). जिथे कुठे तुझ्या प्रयत्नांनी हा बरा होईल तिथे जा! याप्रमाणे त्यांची आज्ञा घेऊन आणि त्यांना नमस्कार करून आपल्या पतीसह ती सावित्री गाणगापूरला निघाली.१८. हळूहळू चालणाऱ्या भोयांनी चालविलेल्या मेण्यात सुखाने पतीला बसवून ती पायीच त्याच्यामागे चालू लागली. पाठीमागून तिने आपल्या पतीला धक्के बसू नयेत म्हणून धरले होते. हत्तीच्या गंडस्थलांप्रमाणे कठीण आणि उन्नत वक्षांच्या भारानेच जणू ती वाकली होती. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावानेच की काय पण खालची जमीनही नम्र झाली होती. हत्तीच्या मागे जाणाऱ्या हत्तीणीसारखी ती गजगामिनी भासत होती.१९. कांही दिवस याप्रमाणे हळूहळू मार्ग क्रमून गाणगापूरच्या जवळ आल्यानंतरच दैवयोगाने तिचा पती मृत्यू पावला. तिने तेव्हांच आत्महत्येचा प्रयत्न केला; पण इतरांनी तिला परावृत्त केले. पतीच्या मृत्यूचे दुःख हीच जणू रात्र, तिच्यामुळे तिचे मुखकमल कोमेजून गेले.आणि ती शोकग्रस्त बाला बोलू लागली.२०.

**कालात्ययं मा कुरु कुर्वथाह्निकमुत्तिष्ठ शेषे कति नाथ विप्रराट् ।**
**कस्मान्न मे दास्यसि वल्लभोत्तरं प्रेष्ठं नु किं ते वचनं व्यलङ्घ्यम् ।।२१।।**
**प्राणाः क्व याताश्च मनः क्व ते गतं द्राक्तान्परावर्तय जीवितुं चिरम् ।**
**लिप्तः स्वमातापितृदारहत्यया भविष्यसि त्वं न तथा करोषि चेत् ।।२२।।**
**उद्वाहितां क्वैषि विहाय मां प्रियां पुत्राननुत्पाद्य कथन्वृणोद्धृतिः ।**
**स्थातव्यमीश क्व कथं न भाषितं कथं व्रजेयं सदनं गुरोश्च वः ।।२३।।**

'(हे) नाथ, विप्र+राट् काल+अत्ययं मा कुरु, आह्निकं कुरु। उत्तिष्ठ, कति शेषे? (हे) वल्लभ कस्मात् मे प्रेष्ठं उत्तरं न दास्यसि? किं नु ते वचनं व्यलंङ्घ्यम्? २१। ते मनः क्व गतं, प्राणाः क्व याताः? तान् द्राक् परावर्तय चिरं जीवितुम्। त्वं तथा न करोषि चेत् स्व+माता+पितृ+दार+हत्यया लिप्तः भविष्यसि।२२।'मां उद्वाहितां प्रियां विहाय क्व एषि? पुत्रान् अनुत्पाद्य कथं नु ऋण+उद्धृतिः? (हे) ईश, क्व कथं स्थातव्यं न भाषितम्। वः गुरोः सदनं च कथं व्रजेयम्?२३।

'अहो नाथा, ब्राह्मणश्रेष्ठा, तुमची संध्येची वेळ कधीच टळत नाही, लवकर उठून संध्या करा. किती झोप ही? वल्लभा, प्रियतमा माझ्याशी तुम्ही का बरे बोलत नाही? मी कांही तुमची अवज्ञा केली का?२१. मन ज्याचे चिंतन करते तेच वाचा बोलते. वाचेचा उपसंहार झाल्यावर केवळ मनाचे मननच उरते. मनाचाही लय झाल्यावर प्राणच राहतात. म्हणून ती साध्वी पतीला विचारते आहे, तुमचे मन, तुमचे प्राण कुठे गेले? जर ते परलोकांत गेले असतील तर लवकर त्याना परत आणा. तुम्हाला अजून पुष्कळ काळ जगायचे आहे. तुम्ही जर तसे केले नाही तर तुम्हांला आपल्या मातापित्यांच्या आणि पत्नीच्या हत्येचा दोष लागेल.' तुमच्यामागे आम्ही कुणीच जगू शकत नाही असा अभिप्राय.२२. 'मला, तुमच्या परिणीत पत्नीला सोडून कुठे जाता? आपल्याला पुत्रही झालेला नसता तुम्ही पितरांच्या ऋणातून कसे मुक्त व्हाल? तुमच्यामागे मी कुठे आणि कसे राहावे तेही जाण्यापूर्वी तुम्ही सांगितले नाहीत! तुमच्या मातापित्यांच्या घरी तरी मी कशी जाऊ?२३.

**सर्वत्र पूता त्वयि जीवतीशितर्-मदास्यमप्यद्य न कोऽपि पश्यति ।**
**सव्रीडनर्मोक्तिसुतल्पहावयुक्ताम्बूललेपादि कथं न ते हृदि ।।२४।।**
**सुखं स्वपोरूत्कुचभारभङ्गभीभीतमध्यात्मसुतल्प ईश ।**
**किं ते शिलाढ्ये शयनं कुपृष्ठे सुप्तः पृथङ्नर्तुमृतेऽद्य किं तत् ।।२५।।**
**नक्रोऽप्सु यद्वत्तृषितं यथा द्रुः श्रान्तं यथा गां तृणगां च हिंस्रः ।**
**प्रासाद ईशेक्षकमुन्निहन्ति जातं तथा मे गुरुदर्शनाप्तेः ।।२६।।**

त्वयि ईशितः जीवति सर्वत्र पूता। अद्य मत्+आस्यं अपि कः अपि न पश्यति। सव्रीड+नर्म+उक्ति सुतल्पं हावयुक् ताम्बूल लेपादि कथं ते हृदि न?२४। (हे) ईश, उरु+उत्+कुच+भार+भङ्ग+भी+भीतं अध्यात्म+सुतल्पं सुखं स्वप। ते शिला+आढ्ये कुपृष्ठे शयनं किम्? ऋतुं ऋते पृथक् न सुप्तः। अद्य किं तत्?२५। यथा तृषितं अप्सु नक्रः, श्रान्तं द्रुः, तृणगां गां च हिंस्रः, ईश+ईक्षकं प्रासादः उत् निहन्ति, तथा मे गुरु+दर्शन+आप्तेः जातम्।'२६।

तुम्ही, माझे स्वामी जिवंत असतांना मी सर्वत्र पवित्र गणली जात होते. आता माझे तोंडही कुणी पाहत नाही. ते लाजत केलेले विनोद, ती सुखशय्या, श्रांगारिक भावाने दिलेले विडे, सुगंधी उटण्याचे लेप हे सगळेच तुम्ही विसरून गेलां काय?२४. पुष्ट आणि उन्नत स्तनांनी मोडण्याच्या भयाने जणू घाबरलेल्या कटीचा हा माझा देह हीच उत्तम शय्या आहे. तिच्यावर आपण सुखाने पहुडा. हे असे दगडांच्या खडबडीत पृष्ठावर का झोपला? ऋतुकाल सोडला तर आपण कधीही माझ्यापासून वेगळे झोपला नाहीत. मग आताच का बरे दूर झोपलात?२५. तहानलेला नदीवर पाणी पिण्यास जावा आणि त्याला सुसरीने धरावे, थकलाभागला झाडाखाली बसावा आणि ते झाडच त्याच्यावर पडावे, भुकेली गाय गवताळ रानांत शिरावी आणि तिथे वाघाने तिच्यावर झडप घालावी, देवाच्या दर्शनाला देवळांत आलेल्यावर ते देऊळच अंगावर पडावे तसे आपल्या भेटीला आलेल्या माझ्यावर हा घोर प्रसंग ओढवला आहे.२६.

**जयेश्वरानन्त कथं त्वया कृतं भिया त्वयात्रापहृतोऽस्ति किं पतिः ।**
**रुक्शान्तिशक्तिर्यदि ते न गम्यतामिति त्वयोक्ते कतमोऽर्दितुं क्षमः ।।२७।।**
**त्वया कृतं साधु यशो दिवं ते वहामि भर्त्रा सह गौरिमातः ।**
**क्वेता ह्यवैधव्यकदानशक्तिर्व्रतेश्वरीशे न कथं स्मृतिर्मे ।।२८।।**
**माङ्गल्यतन्तुं च निशां च कुङ्कुमं हर्तुं महांश्चोर इहागतः कुतः ।**
**सौभाग्यनौर्मे भवसिन्धुसंस्थिता सा कालमीनेन कथं नु चर्विता ।।२९।।**

(हे) ईश्वर (हे) अनन्त, जय! त्वया कथं कृतम्? अत्र भिया पतिः अपहृतः अस्ति किम्? यदि ते रुक्+शान्ति+शक्तिः न, त्वया 'गम्यताम्' इति उक्ते कतमः अर्दितुं क्षमः?'२७। 'त्वया साधु कृतं, ते यशो भर्त्रा सह दिवं वहामि। (हे) मातः गौरि अवैधव्यक+दान+शक्तिः क्व इता? (हे) ईशे, व्रत+ईश्वरी मे स्मृतिः कथं न?२८। माङ्गल्यतन्तुं च निशां च कुंकुमं हर्तुं महान् चोरः इह कुतः आगतः? मे सौभाग्य+नौः भव+सिन्धु+संस्थिता सा काल+मीनेन कथं नु चर्विता?२९।

'परमेश्वरा, अनंता, आपण हे काय केलेत? माझ्या पतीला निरोगी करण्याच्या धाकाने त्याला माझ्यापासून हिरावले काय? जर तुमचे रोग बरा करण्याचे सामर्थ्य नसेल आणि तुम्ही मला घालवून दिले तर आपल्याला जाब विचारण्याची कुणाची टाप आहे?'२७. 'छान केलंस देवा! तुझी कीर्ती या पतीसह आता स्वर्गांत घेऊन जाते. आई, मंगळागौरी तुझे अवैधव्य देण्याचे सामर्थ्य कुठे गेले? हे व्रताच्या देवी, भगवती, '*विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे*' अशी तुझी प्रार्थना करणाऱ्या माझा तुला कसा विसर पडला?'२८. 'माझ्या मंगलसूत्रावर आणि हळदीकुंकवावर घाला घालणारा हा काळरूपी महान् चोर इथे श्रीगुरूंच्या सान्निध्यांत कुठून आला?' श्रीगुरूंच्या जवळ मृत्यूलासुद्धा प्रवेश नाही असा तिचा भाव व्यक्त होतो. 'संसारसागरांतली माझी सौभाग्यनौका काळरूपी मगरीने कशी हो गिळून टाकली?'२९.

**एवं रुदित्वोरुकुचत्रुटत्पटा संस्मृत्य संस्मृत्य तदीयचेष्टितम् ।**
**प्रत्यङ्गमालम्ब्य रुरोद मोहतः साध्वी तदा कश्चन साधुराययौ ।।३०।।**
**रुद्राक्षभूषो भसिताक्तदेहः शूली बभाषे जटिलः स साध्वीम् ।**
**बाले शुचा नैति मृतः कुतस्त्वं मुधोच्चकै रोदिषि तिष्ठ तूष्णीम् ।।३१।।**
**मृत्युर्न केषां विषयोऽपि देवान्ग्रसत्यसौ चापरिहार्य एव ।**
**द्रौ व्यैक्यमब्धौ च यथेन्धनैक्यं भवप्रवाहेऽपि तथा धवादिः ।।३२।।**

एवं रुदित्वा उरु+कुच+त्रुटत्+पटा साध्वी तदीय चेष्टितं संस्मृत्य संस्मृत्य, प्रत्यंगं आलम्ब्य, मोहतः रुरोद। तदा कश्चन साधुः आययौ।३०। रुद्राक्ष+भूषः भसित+आक्त+देहः शूली सः साध्वीं बभाषे। '(हे) बाले, मृतः शुचा न एति। त्वं मुधा उच्चकैः कुतः रोदिषि? तूष्णीं तिष्ठ।३१। मृत्युः केषां न विषयः? असौ देवान् अपि ग्रसन्ति। अपरिहार्य एव। यथा द्रौ वि+ऐक्यं, अब्धौ च इन्धन+ऐक्यं, तथा भव+प्रवाहे अपि धवादिः।३२।

असा विलाप करीत रडत भेकत, अंगावरची चोळी फाटलेल्या अवस्थेत पतीच्या आठवणी काढीत, त्याच्या अंगप्रत्यंगांना कवटाळीत बेभान होऊन ती साध्वी शोक करीत असताना तेथे कोणी एक साधू आला.३०. गळ्यात रुद्राक्षाच्या माळा, अंगावर भस्माचे पट्टे आणि हातात शूल धारण केलेला तो साधू तिला म्हणाला, 'कितीही रडलीस तरी मेलेला परत येणार आहे का? तसे असेल तर अवश्य रड! पण तसे होत नाही. व्यर्थ उच्चस्वराने रडू नकोस. शांत राहा.३१. तुझ्या पतीच्या मृत्यूच्या दुःखाने हा शोक तू करत असशील तर असे पाहा, मृत्यू कुणाला चुकला आहे? हा देवादिकांचाही ग्रास करतो. तो अटळच आहे. पतीच्या विरहामुळे तुला दुःख झाले असे म्हणशील तर झाडावर पक्षी एका रात्रीसाठी एकत्र येतात आणि सकाळ झाली की आपापल्या वाटेने निघून जातात. किंवा समुद्रामध्ये लाकडाचे ओंडके एकत्र येतात आणि पुन्हा परस्परांपासून दूर वाहून जातात. तसे पती, पत्नी, माता, पिता, बंधू, भगिनी इत्यादि संबन्ध हे तात्कालिकच असतात. संसारसागरांत कांही क्षण मात्र एकत्र येऊन पुन्हा आपापल्या प्रारब्धानुसार आपापल्या कर्मानुसार भ्रमण करीत असतात.'३२

**सम्बन्ध एषां नियतो मतश्चेत् प्राग्जन्मनि त्वं वद कस्य का वा ।**
**सम्बन्धिनः कस्य न केऽद्वयत्वाज्जीवश्चिदंशोऽखिलगोऽव्ययोऽजः ।।३३।।**
**पञ्चात्मकेऽस्मिन्खलु संगतेऽत्र भर्त्रादिबुद्धिर्न तु तत्त्वतोऽस्य ।**
**काष्ठाग्निवत्तं तु पुमादिलिङ्ग-हीनं धवादिं प्रकृतिस्थमाहुः ।।३४।।**

'एषां संबन्धः नियतः मतः चेत् त्वं प्राक् जन्मनि कस्य का वा? अद्वयत्वात् कस्य के अपि संबन्धिनः न। जीवः चित्+अंशः अखिलगः, अव्ययः, अजः।३३। अस्मिन् पञ्च+आत्मके संगते अत्र भर्त्रा+आदि+बुद्धिः अस्य न तु तत्त्वतः। काष्ठ+अग्नि+वत् प्रकृति+स्थं पुं+आदि+लिङ्ग+विहीनं धव आदिं आहुः।३४।

'पती, पुत्र इत्यादि संबन्ध जर तुला कायमचे वाटत असतील तर मग सांग बरं तू पूर्वजन्मी कुणा पुरुषाची कोण - पत्नी, माता, कन्या इत्यादि होतीस? वेदांताच्या सिद्धांतानुसार (छांदोग्य उपनिषत् ६:२:१) 'एकच एक ब्रह्म आहे त्याहून वेगळे कांहीच नाही; आणि ते तू आहेस.' अर्थातच त्याला संबंधी कसे व कुठले असणार? 'हा जीव माझाच अंश आहे', या भगवद्गीतेच्या (१५:१७) प्रतिपादनानुसार जीव हा चैतन्याचाच अंश आहे. भगवंतांनीच दुसऱ्या अध्यायांत (२०) म्हटल्याप्रमाणे हा न कधी जन्मतो न मरतो, हा कधी कुणाचा झाला नाही किंवा होणार नाही; हा जन्ममृत्यूरहित, नित्य, शाश्वत आणि पुरातन आहे; शरीराचा नाश केला तरी याचा नाश होत नाही.३३. पंचभूतांच्या या देहांत जीवाचा अनुप्रवेश झाल्यावर होणाऱ्या पती, पिता आदि भावना वेदांच्या कोणत्याही प्रमाणांना धरून नाहीत. लाकडाला आग लागली ती जशी त्याचाच आकार घेते तसा चैतन्याचा अंश असलेला जीव त्या त्या देहासारखा भासतो. कठोपनिषदांत (२:५:९) सांगितल्याप्रमाणे अग्नी ज्या ज्या पदार्थांत प्रवेशतो त्या त्या रूपाचाच होतो. त्याचप्रमाणे हा एकच अंतरात्मा विविध देहांमध्ये प्रवेश करून ती ती रूपे धारण करतो. खरे तर त्या चैतन्याला न रूप आहे न लिंग. तो न स्त्री आहे, न पुरुष, न नपुंसक. जे जे शरीर तो धारण करतो त्याचे गुणधर्म त्याच्यावर आरोपित होतात (श्वेताश्वतर उ. ५:१०). अशा त्या प्रकृतीत स्थिरावलेल्या आत्म्याला अज्ञानी लोक हा 'माझा पती, हा माझा पिता, हा माझा पुत्र' इत्यादि म्हणतात.३४.

**प्राप्तः प्रकृत्युत्थगुणानुगोऽसौ शरीरतादात्म्यमतोऽस्य वृद्धा ।**
**द्वन्द्वप्रतीतिर्न तु सामलेऽजे द्वन्द्वोत्थकर्माश्रयिणो भवोऽस्ति ।।३५।।**
**भवोद्भवः कर्मत एव कर्म भवोद्भवं तूभयमज्ञभावात् ।**
**धीरेण येनोभयमेव कृत्तं तत्त्वासिना तस्य न वै भ्रमोऽयम् ।।३६।।**

प्रकृति+उत्थ+गुण+ अनुगः असौ शरीर+तादात्म्यं प्राप्तः। अतो अस्य द्वन्द्व+प्रतीतिः वृद्धा। सा तु अमले अजे न। भवः द्वन्द्व+उत्थ+कर्म+आश्रयिणः अस्ति।३५। कर्मतः एव भव+उद्भवः, कर्म भव+उद्भवं, उभयं तु अज्ञभावात्। येन धीरेण उभयं एव तत्त्व+असिना कृत्तं तस्य अयं भ्रमः न वै।३६।

प्रकृतीतून उद्भवलेल्या गुणांना अनुसरल्याने हा जीव शरीराशी तादात्म्य पावतो. आपण हे शरीरच आहो अशा मोहांत पडतो. त्यामुळे आपण स्त्री आहो किंवा पुरुष आहो इत्यादि कल्पनांनी सुख-दुःखादि द्वंद्वाचा अनुभव घेतो. ही द्वंद्वप्रतीती शुद्ध, निर्विकार आत्मस्वरूपांत नसते. ह्या द्वंद्वाच्या प्रतीतीतून कर्मे घडतात आणि तीच ह्या जन्ममरणरूपी संसाराचा आश्रय आहेत.३५. असे जर आहे तर कुणी एक देवदत्त जन्मला तर त्याचे यथाशास्त्र जातक करावे अशी लोकांची आणि शास्त्राचीही मान्यता कां आहे? पूर्वजन्माच्या कर्मापासूनच भवाचा म्हणजे देहाचा उद्भव होतो; तसेच त्या देहाने केलेले कर्म (क्रियमाण) हेच पुढच्या जन्माला कारण होते; अशा परस्पर कार्यकारणभावाने जुडलेले देह आणि कर्म ह्या दोन्हींच्या मुळाशी अज्ञान हेच कारण आहे. ब्रह्मसूत्रांतील दोन अधिकरणानी (२.३.१७-१८) हा विषय स्पष्ट केला आहे. स्थावर अथवा जंगम यांच्या संदर्भांत जन्म-मरण हे शब्द शरीराच्या उत्पत्ती आणि लयाला उद्देशून वापरलेले आहेत. जातकर्मविधान हेसुद्धा देहाच्या उत्पत्तीला अनुलक्षून आहे. त्याला जन्म ही केवळ संज्ञा दिली आहे. पुढच्याच सूत्रांत सांगितले आहे की, जीवात्मा कधीच जन्मत नाही कारण तशा अर्थाची श्रुति नाही; उलट त्याच्या नित्यत्वाचे, अजत्वाचे, अविकारित्वाचे प्रतिपादन करणाऱ्या अनेक श्रुति आहेत. वेगळ्या शब्दांत असे म्हणतां येईल की उपाधींचा जन्म हाच जन्म आहे आणि उपाधींचा नाश हेच मरण आहेत, त्यांचा जीवात्म्याशी कांही संबंध नाही. जन्म आणि कर्म ह्या दोन्हींचा छेद जो तत्त्वज्ञानरूपी खड्गाने करतो तो या जन्ममरणरूपी भ्रमांतून सुटतो.३६.

**अस्यास्त्यविद्यैव घटादिवद्द्यो रुपाधिरात्मत्वमुपाध्यपाये ।**
**मालाहिवत्कल्पित एति नाशं भ्रमोऽस्य सद्दर्शिततत्त्वदीपात् ।।३७।।**

द्योः घटादिवत् अस्य अविद्या उपाधिः अस्ति। उ पाधि+अपाये आत्मत्वम्। सत्+दर्शित+तत्त्व+दीपात् अस्य भ्रमः कल्पित माला+अहिवत् नाशं एति।'३७।

जन्म-मरणाला कारण ही उपाधी कोण आहे? आकाशाला जशा घट, मठ आदि उपाधी असतात, ज्यामुळे आकाश सीमित झाल्यासारखे वाटते, तशाच आत्म्याला परिच्छिन्न भासवणाऱ्या देहादि उपाधी आहेत. घट-मठादि उपाधींचा नाश झाला तरी आकाश जसेच्या तसेच राहते. त्याचप्रमाणे देहादि उपाधींचा नाश झाला तरी निर्विकल्प आत्मस्वरूप निर्बाधच राहते. श्वेताश्वतर उपनिषदाच्या प्रतिपादनानुसार (६:११) सर्व भूतमात्रांत एकच अंतरात्मा गूढ रूपाने वास करतो; हाच सर्वव्यापी निर्गुण एकमेवाद्वितीय देव सर्वांच्या अंतरांत साक्षित्वाने राहून त्यांच्या कर्माचे नियंत्रण करतो. अविद्येच्या उपाधीने त्याचे विभाजन झाल्यासारखे वाटते आणि तोच ज्ञानमय, मनोमय, प्राणमय इत्यादी स्वरूपांत भासतो; अर्थातच उपाधींचा संबंध सुटल्यावर त्याचे सहज स्वरूपच राहते. बृहदारण्यक उपनिषदांत (४:१५:१३) प्रज्ञानघनाच ह्या भूतांपासून उडून जातो आणि त्या भूतांचा लय होतो असे सांगितले आहे तो उपाधीचाच प्रलय आहे, आत्म्याचा नव्हे.

**ज्ञानदीप -** *सता* म्हणजे संतांनी दाखविलेल्या दिव्याच्या उजेडाने, माळेवर भासणाऱ्या सर्पासारखा, ह्याचा अनादिकालासून प्रतीत झालेला भ्रम नष्ट होतो. '*सता*'चा अर्थ असाही घेता येईल की आपल्या भक्तांच्या अंतःकरणातील सत्यज्ञानानन्त इत्यादि लक्षणाच्या ईश्वराने आपल्या भक्तावरील अतीव करुणेने दर्शविलेला, भक्तीच्या तेलाने भिजवलेली ब्रह्मचर्यादि साधनांच्या संस्कारलेली बुद्धी हीच ज्याची वात, भगवद्भावाच्या अभिनिवेशाच्या वायूने प्रेरलेला, विषयांच्या वाऱ्यापासून रक्षिलेल्या, आणि म्हणून रागद्वेषादि काजळी नसलेल्या चित्तांत ठेवलेल्या विवेकप्रत्ययरूप अशा ज्ञानदीपाच्या, नित्य अभ्यासाने एकाग्र ध्यानाने झालेल्या सम्यक् दर्शनरूपी प्रकाशाने, अज्ञानापासून उद्भवलेला मिथ्याप्रत्ययरूपी मोहांधःकार नाहीसा होतो. '*तेषामेवानुकंपार्थं अहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता।।*' भ.गीता १०-११।।३७.

**तावद्भ्रमान्तौ नियतौ द्युरात्रिवज्जन्तोरतस्तत्त्वविचारवान्भवेत् ।**
**त्वग्रक्तमांसास्थिमयात्मशोकतः स्वार्थः कुतः साध्वि समुद्भवेद्वद ।।३८।।**
**तस्माच्छुचं मुञ्च सति प्रसाधय स्वार्थं यथा येन भवं तरिष्यसि ।**
**तत्काल एषैव यदा प्रमादतो याता नृयोनिस्तु पुनर्न तत्कथा ।।३९।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**प्राप्ता धवानामयहेतुनाधुना दैवात्पथेऽस्मिन्दयितो मृतः पितः ।**
**सम्बन्धिनोऽप्यन्तरितास्त्वमेव मे सर्वोऽसि मामुद्धर दुःखसागरात् ।।४०।।**

तावत् जन्तोः भ्रम+अंतौ द्यु+रात्रिवत् नियतौ। अतः तत्त्व+विचारवान् भवेत्। (हे) साध्वि, त्वक्+रक्त+मांस+अस्थि+मय+ आत्म+शोकतः कुतः स्वार्थः समुद्भवेत्?३८। तस्मात् (हे) सति, शुचं मुञ्च। स्वार्थं प्रसादय, येन यथा भवं तरिष्यसि। एष एव तत् कालः। यदा प्रमादतो नृ+योनिः याता तु पुनः तत्+कथा न।३९। साध्वी उवाच। धव+अनामय+हेतुना प्राप्ता। दैवात् अस्मिन् पथे दयितः मृतः। पितः सम्बन्धिनः अपि अन्तरिता। त्वं एव मे सर्वः असि। मां दुःख+सागरात् उद्धर।४०।

'तत्त्वज्ञानदीपाने अज्ञानतमाचा नाश होईपर्यंत जीवाला हे जन्मरूपी भ्रम आणि उपाधिनाशरूपी मरण ही दिवस आणि रात्र यांप्रमाणे ठरलेले आहेत. तेवढ्यासाठी विचार-विवेक केला पाहिजे. त्वचा, मांस, रक्त, अस्थी इत्यादींच्या बनलेल्या शरीरासंबंधी शोक करत राहण्याने खरा स्वार्थ - मनुष्यजन्माचे ध्येय जो मोक्ष, तो कसा सिद्ध होणार?३८. याकरिता हे सती, हा शोक आवर आणि पारलौकिक स्वार्थ साध. त्यानेच तू हा भवसागर तरशील. हीच ती वेळ आहे. जोपर्यंत वार्धक्याने इंद्रिये दुर्बल होत नाहीत, शरीर परावलंबी होत नाही तोपर्यंतच हा प्रयत्न करायला हवा. एकदा हा मानव जन्म प्रमादाने हातातून निसटला की पुनः त्याची वार्ताही दुर्लभ होईल.'३९. ती सती म्हणाली, 'माझ्या पतीला आरोग्य व्हावे म्हणून मी दुरून इथे आले आहे. दुर्दैवाने इथे वाटेतच माझ्या पतीला मृत्यू आला. वडीलधारे व इतर संबंधीही दुरावले. आता आपणच माझे सर्व कांही आहात. ह्या दुःखसागरातून मला वर काढा! माझा उद्धार करा' हे सतीच्या मुखांतील शब्द गुरूपसत्तीचे निदर्शक आहेत.४०.

### ।। साधुरुवाच ।।

**भर्तैव तारकं साध्व्या नोपाया बहवो नृवत् । शृण्वगस्त्यसतीस्तोत्र-प्रसङ्गोक्तं वृषं सुरैः ।।४१।।**
**विन्ध्योत्कर्षभियैत्य तद्गुरुमगस्त्यं तद्वधूं निर्जरैः । साकं देवगुरुर्जगौ सति रमा सावित्र्युमारुन्धती ।।**
**इत्याद्या अपि साध्व्य उत्तमतमा तासां त्वमेवास्यहो। छायेवानिशमीशसेवनपरा त्वन्निघ्नमेतज्जगत् ।।४२।।**
**भक्त्या छायेव याश्रान्तं स्वभर्तृपरिचारिणी । पतिरेव व्रतं यस्या अखण्डं सा पतिव्रता ।।४३।।**

साधुः उवाच। 'साध्व्या भर्ता एव तारकः। नृवत् बहवः उपायाः न। सुरैः अगस्त्य+सती+स्तोत्र+प्रसङ्ग+उक्तं वृषं शृणु।'४१। विन्ध्य+उत्कर्ष+भिया तत्+गुरुं अगस्त्यं निर्जरैः साकं एत्य देवगुरुः तत्+वधूं जगौ। '(हे) सति, रमा, सावित्री, उमा, अरुन्धती इत्याद्या साध्व्यः। तासां त्वं एव छाया इव अनिशं ईश+सेवन+परा उत्तमतमा असि। एतत् जगत् त्वत्+निघ्नम्।४२। या भक्त्या छाया इव अश्रान्तं स्व+भर्तृ+परिचारिणी, यस्या पतिः एव अखण्डं व्रतं, सा पतिव्रता।४३।

तेव्हां तो साधू उत्तरला, 'स्त्रियांना पती हाच एकमेव तारक (तारकः) आहे. पुरुषांप्रमाणे त्यांच्यासाठी अनेक उपाय नाहीत. देवांनी अगस्तीची पत्नी लोपामुद्रा हिचे स्तवन करताना प्रसंगाने सांगितलेला (स्त्रियांचा) धर्म मी तुला सांगतो. ऐक.' *'भर्तैव ता रकं'* असा पाठ घेतला तर भर्ता हाच हृदयस्थ तारक ब्रह्म आहे असा अर्थ लावावा.४१. स्कंद पुराणातील कथा आहे. मेरु पर्वताच्या ईर्षेने विंध्य पर्वत आपली उंची वाढवू लागला. वाढत वाढत तो सूर्यमंडलासमोरून स्वर्गभुवनाच्या वर गेला. त्यामुळे त्याच्या दक्षिणेला सूर्यकिरण पोचेनात. अर्थात सर्व यज्ञादिकर्मांचा लोप होऊ लागला. तेव्हा विंध्य पर्वताला नमविण्यासाठी त्याचे गुरू अगस्ती ऋषी यांच्याकडे सर्व देवांसह बृहस्पती गेले. त्या वेळी अगस्तींची पत्नी लोपामुद्रा हिची स्तुती करतांना देवगुरू बृहस्पतींनी स्त्रियांचे धर्म सांगितले. ते म्हणाले, 'हे सती लोपामुद्रे, लक्ष्मी, सावित्री, पार्वती, अरुन्धती इत्यादि महान साध्वी आहेत. पण सावलीसारखी पतीची निरंतर सेवा करणारी तूच सर्व पतिव्रतात श्रेष्ठतम आहेस. जी भक्तिभावाने आपल्या पतीची सावलीसारखी अथक सेवा करते आणि पती हेच जिचे अखंड व्रत आहे ती पतिव्रता.'४३.

**पादाम्बु तीर्थमुच्छिष्टं प्रसादो देवतार्चनम् । तत्सेवा भूषणं तोषो धर्मोऽनुज्ञानुपालनम् ।।४४।।**
**वशानुवर्तनं देह-यात्रा श्वश्र्वादिगौरवम् । लोकयात्रेश्वरो भर्ता करणं पोष्यपोषणम् ।।४५।।**
**कार्यं नाज्ञां विना किञ्चिद् दूरात्स्थेयं स्थिते प्रिये । सुप्तोत्थितात्प्रागुत्थाय सेव्योऽश्रान्तं पतिर्मुदा ।।४६।।**
**तस्मै दत्वेष्टमाप्लुत्य गृहसंमार्जिनादिकम् । दत्वेशायेष्टसंभारा देयाः स्वादु च भोजनम् ।।४७।।**
**क्रुद्धश्चेत्प्रार्थनीयो न गन्तव्यं परसद्मनि । नाज्ञां विना गुरोर्गेहे न वक्तव्यं सदेतरैः ।।४८।।**

पाद+अम्बु तीर्थं, उच्छिष्टं प्रसादो, तत्+सेवा देवता+अर्चनं, तोषो भूषणं, अनुज्ञा+अनुपालनं धर्मः।४४। वश+अनुवर्तनं देहयात्रा, श्वश्रू+आदि+गौरवं लोकयात्रा, भर्ता ईश्वरो, पोष्य+पोषणं करणम्।४५। आज्ञां विना किञ्चित् (अपि) न कार्यम्। प्रिये स्थिते दूरात् स्थेयम्। सुप्त+उत्थितात् प्राक् उत्थाय पतिः अश्रान्तं मुदा सेव्यः।४६। तस्मै इष्टं दत्वा आप्लुत्य गृह+संमार्जन+आदिकम्। ईशाय इष्ट+संभारा, स्वादु भोजनं च देयाः। ४७। क्रुद्धः चेत् प्रार्थनीयः। परसद्मनि न गन्तव्यम्। आज्ञां विना गुरोः गेहे न (गन्तव्यम्)। सदा इतरैः न वक्तव्यम्।४८।

आपल्या पतीच्या पायावरचे पाणी हेच तीर्थ, त्याचे उच्छिष्ट हाच प्रसाद, त्याची सेवा हीच देवपूजा, त्याचा संतोष हाच अलंकार आणि त्याच्या आज्ञेचे पालन हाच धर्म जाणावा.४४. पतीच्या मर्जीनुसार वागणे हीच तिची देहयात्रा आहे तर सासू-सासरे इत्यादींचा मान ठेवणे हीच तिची लोकयात्रा आहे. पती हाच तिचा परमेश्वर आहे. लहान-थोर सर्व पोष्य कुटुंबियांचे पोषण हे तिचे कर्तव्य आहे.४५. पतीच्या आज्ञेवाचून कांहीही करू नये. पती उभा असेल तर आपण मर्यादेने थोडे अंतर ठेवून उभे राहावे. पती झोपून उठायच्या आत आपण उठावे आणि आनंदाने अविश्रांत पतीची सेवा करावी.४६. पतीला हवे ते देऊन स्नानादि करावे आणि घराचा स्नान-सडा करावा. पतीला पूजादिकांसाठी पाणी, फुले इत्यादि इष्ट ती सामुग्री देऊन त्याला रुचकर भोजन द्यावे.४७. पती रागावले तर त्याची विनवणी करावी. दुसऱ्यांच्या घरी जाऊ नये. पतीच्या परवानगीशिवाय आपल्या माहेरी जाऊ नये. सारखे विनाकारण दुसऱ्यांशी बोलू नये.४८.

**मन्दं श्वश्र्वादिसामीप्ये वक्तव्यं सन्धयेशितुः । इष्टं देहीति नो वाच्यं वक्तव्यं परवक्त्रतः ।।४९।।**
**स्वीकार्यं वस्त्रभूषादि भर्त्रा दत्तं यदृच्छया । न निन्द्यो दुर्भगो दीनो दुःशीलोऽपि शिवोपमः ।।५०।।**
**न कार्यं स्वैरिणीसख्यं स्वानां पार्थक्यमप्युत । धार्याः सौभाग्योपचारा न भूषाः प्रोषिते प्रिये ।।५१।।**
**दर्शितव्यं मुखं नर्तौ श्रोतव्यं नागमादिकम् । स्नात्वा चतुर्थेऽह्नि भर्ता प्रेक्ष्यो वाऽसम्भवे रविः ।।५२।।**
**प्रोषितेऽर्च्याज्ञया स्थेयं प्रत्युद्गन्तव्यमागते । सव्रीडहावरत्यङ्घ्रि-सेवाद्यैस्तोषणीय इत् ।।५३।।**

श्वश्रू+आदि+सामीप्ये मन्दं वक्तव्यम्। ईशितुः सन्धया (वक्तव्यम्)। इष्टं देहि इति नो वाच्यम्। पर+वक्त्रतः वक्तव्यम्।'४९। 'भर्त्रा यदृच्छया दत्तं वस्त्र+भूषा+आदि स्वीकार्यम्। न निन्द्यः। दुर्भगः, दानः, दुःशीलः अपि शिव+उपमः।५०। स्वैरिणी+सख्यं न कार्यम्। स्वानां पार्थक्यं अपि। सौभाग्य+उपचाराः धार्याः। प्रिये प्रोषिते भूषाः न (धार्याः)।५१। ऋतौ मुखं न दर्शितव्यं, आगमादिकं न श्राव्यम्। चतुर्थे अह्नि स्नात्वा भर्ता प्रेक्ष्यः। वा असम्भवे रविः (प्रेक्ष्यः)।५२। प्रोषिते अर्च्य+आज्ञया स्थेयम्। आगते प्रत्युद्गन्तव्यम्। स+व्रीड+हाव+रति+अङ्घ्रि+सेवाद्यैः तोषणीयः इत्।५३।

सासू-सासरे इत्यादी वडीलधाऱ्यांशी नम्रतेने आणि हळू बोलावे. पतीशीही मर्यादेने बोलावे. आपल्याला 'अमुक पाहिजे' असे न म्हणता इतरांच्या (पुत्र-कन्या आदि) तोंडून त्यांच्या कानांवर घालावे.४९. पतीने स्वेच्छेने दिलेली वस्त्रे, अलंकार स्वीकारावे. त्याची निंदा करू नये. भाग्यहीन, दरिद्री आणि दुःशील जरी असला तरी तो शिवासमान पूज्य मानावा.५०. स्वैराचारी स्त्रियांशी मैत्री करू नये. आपल्या सासरच्या लोकापासून वेगळे होऊ नये. हळदी, कुंकू, काजळ, शेंदूर आणि लेणी (मंगळसूत्र इत्यादि) हे सौभाग्य उपचार धारण करावेत. पती गावाला किंवा परदेशाला गेल्यावर अलंकार वर्ज्य करावेत.५१. ऋतुकाळी तोंड दाखवू नये, वेदादिक ऐकू नयेत. चौथ्या दिवशी स्नान करून पतीचे तोंड पाहावे. ते शक्य नसेल तर सूर्याचे दर्शन घ्यावे.५२. पती दूर गांवाला गेल्यावर सासू-सासरे इत्यादि वडीलधाऱ्यांच्या आज्ञेने राहावे. पती बाहेरून आल्यावर सामोरे जावे. लज्जा, हावभाव, संभोग, पाय चुरणे इत्यादींनी त्याला संतोषवावे.५३.

**सुप्तेऽस्मिन्च्छयनं कार्यं नोच्चार्यं पतिनाम च । भोक्तुं नान्यत्र गन्तव्यं याच्ञा कार्या न कुत्रचित् ।।५४।।**
**वैषम्येऽपि सुखं कल्प्यं कल्प्येशे दुःखिते न मुत् । त्याज्यमुच्चासनं लीला धवाद्यग्रे हसस्तथा ।।५५।।**
**प्रतिवादाच्छुनी भर्तुरुलूकी गुरुवर्जनात् । पतिं विना स्वादुभुक्त्या वराहोलूकयोनिगा ।।५६।।**
**मूका रोषोक्त्या व्याघ्री स्यात् कृतताडनभाषिणी । सपत्नीवैरतः स्त्री स्याद् दुर्भगा जारगा कृमिः ।।५७।।**
**पत्यौ मृतेऽनुगन्तव्यं स्थेयं वा विधवावृषे । शवाभावे गर्भिणीत्वेऽल्पेऽर्भे वैधव्यपालनम् ।।५८।।**

अस्मिन् सुप्ते शयनं कार्यम्। पति+नाम न उच्चार्यम्। भोक्तुं अन्यत्र न गन्तव्यम्। कुत्रचित् याच्ञा न कार्या।५४। वैषम्ये अपि सुखं कल्प्यम्। ईशे दुःखिते मुत् कल्प्यः। धवादि अग्रे उच्च+आसनं, लीला तथा हसः त्याज्यम्।५५। भर्तुः प्रतिवादात् शुनी, गुरु+वर्जनात् उलूकी, पतिं विना स्वादु+भुक्त्या वराह+उलूक+योनिगा।५६। रोषोक्त्या मूका, कृत+ताडन+भाषिणी व्याघ्री स्यात्। सपत्नी+वैरतः स्त्री दुर्भगा स्यात्। जारगा कृमिः।५७। पत्यौ मृते अनुगन्तव्यं वा विधवा+वृषे स्थेयम्। शव+अभावे, गर्भिणित्वे, अल्पे अर्भे वैधव्य+पालनम्।५८।

दारिद्र्यादि विषम काळातही सुख मानावे; मन प्रसन्न ठेवावे. पती दुःखात असेल तर आपण आनंद मानू नये. पती, सासू, सासरे इत्यादींच्या समोर उच्च आसनावर बसू नये, खेळू नये किंवा मोठ्याने हसू नये.५४. पतीला झोप लागल्यावर आपण झोपावे. पतीच्या नावाचा उच्चार करू नये. जेवणासाठी इतरांच्या घरी जाऊ नये. कुणाजवळही याचना करू नये.५५. नवऱ्याला उलट उत्तरे देणारी कुत्र्याच्या जन्माला जाते. सासू-सासऱ्यांची वंचना करणारी जन्मांतरी घुबडी होते. पतीला सोडून गोड खाणारी डुकराच्या किंवा घुबडाच्या जन्माला जाते.५६. पतीला रागाने बोलणारी जन्मांतरी मुकी होते. 'मला पतीने मारले' अशी चहाडी करणारी वाघीण होते. सवतीशी वैर करणारी दरिद्री होते. जारकर्म करणारी किड्याच्या जन्माला जाते.५७. पतीच्या मृत्यूनंतर सहगमन करावे किंवा विधवाधर्माने राहावे. विशेषतः पतीचे शव मिळत नसेल, किंवा स्त्री गरोदर असेल वा तिचे लहान मूल असेल तर सहगमन न करता विधवाधर्माचे पालन करावे.५८.

**शिरसो वपनं कार्यं भुवि शय्या सकृद्भुजिः । वर्ज्यास्ताम्बूलगन्धादि सुभोगा मंगलाप्लुतिः ।।५९।।**
**त्याज्याः सौभाग्योपचारा धार्यं गौरांशुकं सदा । राधमाघोर्जेषु कार्यं स्नानदानव्रतादिकम् ।।६०।।**
**शक्तौ चान्द्रायणं कार्यं भोज्यं वाज्यफलादिकम्। यत्प्रियं सति पत्यौ तद्देयं विप्राय भक्तितः ।।६१।।**
**मासव्रतं च कल्पोक्तं कार्यं यद्यत्तु वर्जितम् । देयं विप्राय चोष्णाम्बु तोषणीयस्तु तैर्थिकः ।।६२।।**

शिरसः वपनं कार्यं, भुवि शय्या, सकृत् भुजिः। ताम्बूल+गन्धादि, सुभोगा, मंगल+आप्लुतिः वर्ज्याः।५९। सौभाग्य+उपचाराः त्याज्याः। सदा गौर+अंशुकं धार्यम्। राध+माघ+ऊर्जेषु स्नान+दान+व्रतादिकं कार्यम्।६०। शक्तौ चान्द्रायणं कार्यम्। वा आज्य+फल+आदिकं भोज्यम्। पत्यौ यत् प्रियं सति तत् विप्राय भक्तितः देयम्।६१। कल्प+उक्तं मास+व्रतं च कार्यम्। यत् यत् तु वर्जितं उष्ण+अम्बु च विप्राय देयम्। तैर्थिकः तोषणीयः।६२।

**विधवाधर्मा**चे निरूपण करतात. डोक्यावरचे केस काढावेत. जमिनीवर झोपावे. रोज एक वेळच जेवावे. विडा, गंध, पुष्प इत्यादि छानछौकीच्या वस्तू सोडाव्या. मंगलस्नान करू नये.५९. हळदी-कुंकू इत्यादि सौभाग्य चिह्नांचा त्याग करावा. नेहमी पांढरे किंवा लाल वस्त्र नेसावे. वैशाख, माघ आणि कार्तिक या महिन्यांत स्नान, दान, व्रत इत्यादींचे आचरण करावे.६०. शक्ती असेल तर चांद्रायण करावे; किंवा तूप, फळे इत्यादींवर राहावे. पती असतांना जे पदार्थ आपल्या आवडीचे असतील ते ब्राह्मणाला भक्तीपूर्वक दान करावे.६१. कल्पांत (शास्त्रांत) सांगितलेले मासाचे व्रत विशिष्ट पदार्थ सोडणे, थंड पाण्याने स्नान करणे इत्यादि, आचरावे. जे जे आपण सोडलेले ते ते पदार्थ ब्राह्मणाला दान करावे. तसेच ब्राह्मणाला ऊन पाणी द्यावे. तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांना दानादिकांनी संतुष्टवावे.६२.

**पुत्रे तदाज्ञया स्थेयं सम्पूज्यः पतिवद्धरिः । गुरुगोऽतिथिसद्विप्राः पूज्यास्त्याज्यं कुभोजनम् ।।६३।।**
**हरिलीलारतिः कार्याऽपुत्रया पितृतर्पणम् । गोप्यं शीलं स्वकैः सार्धं तद्वैगुण्यादधोगतिः ।।६४।।**
**एतद्धर्माश्रयात्साध्वी दुर्गतिस्थमपि प्रियम् । प्रसह्योद्धृत्य चिल्लीव सर्पं स्वर्विशति ध्रुवम् ।।६५।।**
**लोपामुद्रे त्वत्ततोऽसौ सतीधर्मोऽत्र तारकः । एवं जीवोक्तधर्मस्ते मयोक्तः स्वेच्छयाचर ।।६६।।**

पुत्रे (सति) तत्+आज्ञया स्थेयम्। हरिः पतिवत् पूज्यः। गुरु+गो+अतिथि+सत्+विप्राः पूज्याः। कुभोजनं त्याज्यम्।६३। हरि+लीला+रतिः कार्या। अपुत्रया पितृ+तर्पणम् (कार्यम्)। शीलं गोप्यम्। तत्+वैगुण्यात् स्वकैः सार्धं अधोगतिः।६४। एतत्+धर्म+आश्रयात् साध्वी दुर्गतिस्थं अपि प्रियं चिल्ली सर्पं इव प्रसह्य उद्धृत्य ध्रुवं स्वः विशति।६५। (हे) लोपामुद्रे, त्वत्+ततः असौ सती+धर्मः तारकः। एवं जीव+उक्त+धर्मः मया उक्तः। स्व+इच्छया आचर।६६।

मुलगा असेल तर त्याच्या आज्ञेत राहावे. विष्णूची पतीभावाने पूजा करावी. गुरू, गोमाता, अतिथी आणि योग्य ब्राह्मण यांची पूजा करावी. कांदा, लसूण इत्यादि निषिद्ध पदार्थ खाऊ नयेत. कारण मनुस्मृतीनुसार (११:५६) ते सुरापानासमान आहेत. (*ब्रह्मोझ्झं वेदनिन्दां च कौटसाक्ष्यं सुहृद्वधः। गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट्।।*)६३. भगवंताच्या लीलांचे भक्तिपूर्वक श्रवण करावे. पुत्र नसेल तर पत्यादि त्रयी आणि पित्रादि त्रयींना उद्देशून तर्पण करावे. शीलाचे संरक्षण करावे. त्यांत वैगुण्य आले तर पूर्वजांसह आपण अधोगतीला जातो.६४. ह्या विधवाधर्माच्या आश्रय घेणारी साध्वी, पती नरकांत जरी असला तरी, घारीने सर्पाला ओढून आकाशांत न्यावे तसे त्याला तेथून बळाने खेचून काढून दीर्घकाल स्वर्गाला घेऊन जाते.६५. हा धर्म सांगून झाल्यावर बृहस्पती म्हणाले, 'लोपामुद्रे, तुझ्यासारख्या सतींपासून विस्तारलेला हा पतिव्रताधर्म खरोखर तारक आहे.' श्रीगुरू म्हणतात, 'बृहस्पतींनी प्रतिपादलेला हा धर्म मी तुला सांगितला. आतां तू तुला जे रुचेल तेच कर. पतीच्या मृत्यूनंतर जी नारी ब्रह्मचर्याचे पालन करते ती जरी निपुत्रिक असली तरी मनुस्मृतीत (५:१६०) तिला ब्रह्मचाऱ्यांप्रमाणे स्वर्गवासाचे फळ सांगितले आहे.' (*मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यं व्यवस्थिता। स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः।।*)६६.

**भेवार्कं पतिमन्वेहि रोचतेऽनुगमो यदि । स्वर्याति गौरवाद्येन प्रोद्धृत्येशं यमादपि ।।६७।।**
**प्रत्यङ्घ्र्यश्वक्रतुफलं कोट्यब्दं प्रतिरोमतः । स्वर्वासः सार्धत्रिकोटि-रोमहोमात्प्रियान्वितः ।।६८।।**
**रूपलावण्यसंपन्नाः स्त्रियः सन्ति गृहे गृहे । ताभिः किं कार्यमेकैव साध्वी त्रिकुलपावनी ।।६९।।**
**क्ष्मावातोऽर्कोऽग्निर्बिभेति स्वत्रासोऽस्या भवेदिति । तिष्ठन्ति प्रणता देवाः स्वपदच्युतिशङ्कया ।।७०।।**

यदि अनुगमः रोचते, अर्कं भा इव पतिं अन्वेहि। येन यमात् अपि ईशं प्रोद्धृत्य गौरवात् स्वः याति।६७। प्रति+अंघ्रि अश्वक्रतु+फलं, सार्धत्रिकोटि+रोम+होमात् प्रतिरोमतः प्रिया अन्वितः कोटि+अब्दं स्वः+वासः।६८। रूप+लावण्य+संपन्नाः स्त्रियः गृहे गृहे सन्ति। ताभिः किं कार्यम्? एक एव साध्वी त्रि+कुल+पावनी।६९। अस्याः स्व+त्रासः भवेत् इति क्ष्मा+वातः+अर्कः+अग्निः बिभेति। देवाः स्व+पद+च्युति+शंकया प्रणताः तिष्ठन्ति।७०।

'तुला जर सहगमनाची आवड असली तर, सूर्यासह जशी त्याची प्रभा जाते तशी तू पतीसह जा. त्यायोगे तू पतीला यमापासूनही बळाने खेचून, देवादिकांनी केलेल्या सत्कारपूर्वक स्वर्गांत जाशील.'६७. 'सहगमन करणारी स्त्री प्रत्येक पावलागणिक एकेका अश्वमेधाचे पुण्य मिळवीत असते. सती आपल्या शरीराच्या साडेतीन कोटी रोमांची आहुती देते. त्या प्रत्येक रोमासाठी एक ती एकेक कोटी वर्षे पतीसह स्वर्गांत वास करते.६८. सौंदर्य आणि लावण्य मिरविणाऱ्या स्त्रिया काय घरोघरी आहेत. त्यांना घेऊन काय करायचे? एक जरी पतिव्रता सती असली तरी ती पित्याच्या, मातेच्या आणि पतीच्या अशा तीन कुळांना पावन करते.६९. 'ह्या पतिव्रतेला आपल्यामुळे कष्ट तर होणार नाहीत ना?' अशा शंकेने पृथ्वी, वायू, सूर्य आणि अग्नी हे धास्तावलेले असतात. सर्वही देव तिने आपल्याला पदापासून काढू नये म्हणून हात जोडून नम्रतेने उभे असतात.७०.

**साध्व्या इयान्प्रभावोऽस्ति धन्यैषा पितृतारका । धिग्दुःशीलामधःशेते या चिरं त्रिकुलैः समम् ।।७१।।**

**।। साध्व्युवाच ।।**

**वैधव्यपालनं कष्टं तारुण्याद्यत्र घातकम् । प्रीतिर्धवानुगमने नूनं मे वर्धते गुरो ।।७२।।**

**।। साधुरुवाच ।।**

**साधु साध्वि तदिष्टं ते मा शुचो दैवमुन्नतम् । आयुष्मद्भीष्मपौलस्त्य-मुखाः कालवशं गताः ।।७३।।**
**कालोऽजय्योऽमरैश्चापि दुर्धरः सद्गुरुं विना । गुरुदर्शनकामाप्ता दूरात् तत् त्वं समाचर ।।७४।।**

'साध्व्या इयान् प्रभावः अस्ति। एषा पितृतारका धन्या। या त्रिकुलैः समं चिरं अधः शेते (तां) दुःशीलां धिक्।७१। साध्वी उवाच। वैधव्य+पालनं कष्टम्। अत्र तारुण्य आदि घातकम्। (हे) गुरो मे धव+अनुगमने प्रीतिः वर्धते।७२। साधुः उवाच। 'साधु! (हे) साध्वि तत् ते इष्टम्। मा शुचः। दैवं उन्नतम्। आयुष्+मत्+भीष्म+ पौलस्त्य+मुखाः कालवशं गताः।'७३। 'कालः अमरैः अपि अजय्यः। सद्गुरुं विना दुर्धरः। त्वं दूरात् गुरु+दर्शन+काम+आप्ता। तत् समाचर।७४।

'एवढा साध्वीचा प्रभाव असतो. सर्व पितर तारणारी ती पतिव्रता खरोखरच धन्य होय. तिच्या उलट तिन्ही कुळांना दीर्घ नरकवासाला घेऊन जाणाऱ्या दुर्वर्तनी स्त्रीचा धिक्कार करावा तेवढा थोडाच आहे.'७१. त्या तापसाचे बोलणे ऐकून ती साध्वी म्हणाली, 'विधवेच्या धर्माचे आचरण फारच कष्टप्रद वाटते. शिवाय माझे तारुण्यादि माझ्या घाताला कारण होण्याची भीती वाटते. गुरुमहाराज, हा सर्व विचार करून मला पतीच्या मागे सहगमन करण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे.'७२. साधू म्हणाले, 'छान बोललीस! तेच तुझ्या कल्याणाचे आहे. शोक करू नकोस. दीर्घायुषी म्हणविलेले भीष्म आणि रावण आदिसुद्धा मृत्यूचे ग्रास झालेच ना?७३. काळ हा देवादिकांनासुद्धा अजिंक्य आहे. सद्गुरूंवाचून त्याचा सामना करणे अशक्य आहे. तू लांबून श्रीगुरुदर्शनाच्या इच्छेने आली आहेस तर ते तू कर.'७४.

**स्नात्वा पीताम्बरं धृत्वा प्रायश्चित्तपुरःसरम् । सौभाग्यवायनान्यङ्ग सपत्नीकद्विजेभ्य इत् ।।७५।।**
**दत्वा श्रुत्योर्गले चेमान् बध्वाक्षान्भस्म मस्तके । लिप्त्वाङ्गं गुरुपादाद्भिः प्रोक्ष्येशमनुयाह्यिये ।।७६।।**
**इत्युक्त्वा भस्मरुद्राक्षान् दत्वागात्सोऽपि सा द्विजान् । आहूयादात्सुसौभाग्य-दानानि बहुशो मुदा ।।७७।।**
**प्राहानुगान्यात गृहमुमेशौ पितरौ मम । यास्ये तत्रात्र हर्षात्स्वरिति वाच्यं गुरून्प्रति ।।७८।।**
**इत्युक्त्वा नीयमानस्य पत्युरग्निकराग्रतः । गच्छन्ती मन्थरोमेव रेजे मुद्रूपिणी सती ।।७९।।**

'(हे) अङ्ग, स्नात्वा, पीताम्बरं धृत्वा सपत्नीक+द्विजेभ्यः सौभाग्य+वायनानि दत्वा,।७५। इमान् अक्षान् श्रुत्योः गले च बध्वा, मस्तके भस्म लिप्त्वा, ईशं गुरु+पाद+अद्भिः प्रोक्ष्य अनुयाह्यहि।७६। इति उक्त्वा भस्म+रुद्राक्षान् दत्वा सः अगात्। सा अपि द्विजान् आहूय मुदा बहुशः सौभाग्य+दानानि अदात्।७७। अनुगान् प्राह, गृहं यात। उमा+ईशौ मम पितरौ, तत्र यास्ये। अत्र हर्षात् स्वः इति गूरून् प्रति वाच्यम्।७८। इति उक्त्वा नीयमानस्य पत्युः अग्रतः अग्निकरा मन्थरा गच्छन्ति सती उमा इव रेजे।७९।

'बाळे, स्नान करून पीतांबर धारण करून ब्राह्मणांना व सुवासिनींना सौभाग्याची वाणे देऊन,७५. हे रुद्राक्ष पतीच्या कानांत व गळ्यांत बांधून, त्याच्या कपाळावर भस्म लेपून, श्रीगुरूंच्या पायाचे तीर्थ त्याच्यावर शिंपून मग तू सहगमन कर.'७६. असे बोलून आणि भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन तो तापसी आपल्या वाटेने निघून गेला. त्या साध्वीनेही मग ब्राह्मणांना सपत्नीक बोलावून आनंदाने विपुल सौभाग्य वस्तूंचे दान केले.७७. आपल्या सोबत आलेल्या लोकांना तिने बोळवले. म्हणाली, 'गांवाकडे घरी जा. शिव आणि पार्वती हेच माझे मातापिता आहेत. आम्ही त्यांच्याकडे जातो. आम्ही उभयतां इथे आनंदांत आहोत असे माझ्या सासू-सासऱ्यांना सांगा.'७८. असे बोलून स्मशानाकडे चालविलेल्या पतीच्या प्रेतापुढे अग्नी हातांत घेऊन हळूहळू जाणारी ती सती साक्षात् पार्वतीप्रमाणे शोभत होती.७९.

**भर्तृसौख्यानभिज्ञेयं षोडशाब्दातिसुंदरी । कुलोद्धर्त्री सुधन्येति स्तूयमाना जनैर्ययौ ।।८०।।**
**श्मशानमेत्य संस्कृत्य कुण्डेऽग्निं वायनादिभिः । सुवासिनीस्तोषयित्वा सस्मार गुरुभाषितम् ।।८१।।**
**लिप्त्वाङ्गे भस्म बध्वाक्षान् पत्युर्विप्राज्ञया गुरुम् । द्रष्टुकामा ययौ साध्वी संगमं तं स्तुवन्त्यजम् ।।८२।।**
**दाता सर्वेश्वरस्त्वं शरणमपि सतां त्र्यात्मको विश्वसर्ग-**
**स्थित्यन्तानां निदानं ततबिरुदचयः श्रीहरिस्त्वं दयाब्धिः ।**
**मत्तुल्यास्त्वत्कृपांशात्सुपतिसुतसुखाः सन्ति नार्योऽज यास्ये**
**स्वर्भूत्वा पूर्णकामा पतिसुतमुदिता कीर्तिमादाय तेऽद्य ।।८३।।**

भर्तृ+सौख्य+अनभिज्ञा इयं षोडश+अब्दा अतिसुंदरी कुल+उद्धर्त्री सुधन्या इति जनैः स्तूयमाना ययौ।८०। श्मशानं एत्य, कुंडे अग्निं संस्कृत्य, वायनादिभिः सुवासिनीः तोषयित्वा गुरु+भाषितं सस्मार।८१। पत्युः अङ्गे भस्म लिप्त्वा, अक्षान् बध्वा, गुरुं द्रष्टु+कामा साध्वी विप्र+आज्ञया, तं अजं स्तुवन्ति संगमं ययौ।८२। 'त्वं सतां अपि शरणं त्रि+आत्मकः विश्व+सर्ग+स्थिति+अंतानां निदानं सर्वेश्वरः तत+बिरुद+चयः श्रीहरिः दाता दया+अब्धिः। '(हे) अज, मत्+तुल्याः त्वत्+कृपा+अंशात् सुपति+सुत+सुखाः नार्यः सन्ति। अद्य पूर्ण+कामा पति+सुत+मुदिता ते कीर्तिं आदाय स्वः यास्ये।'८३।

'पहा हो ही सोळा वर्षांची सुकुमार सुंदर मुलगी, जिला पतिसुख म्हणजे काय हेसुद्धा ठाउक नाही, सहगमन करून कुळांचा उद्धार करते आहे. ही खरोखर धन्य धन्य आहे,' अशी लोकांची स्तुतिसुमने ऐकत ती जात होती.८०. स्मशानांत येऊन कुंडांतील अग्नीवर संस्कार करून तिने सुवासिनींना वाणे दिली आणि तिला गुरूंचे भाषण आठवले.८१. त्यांनी सांगितल्याप्रमाणे पतीच्या शरीराला भस्म लावून त्याच्या गळ्यात आणि कानांत रुद्राक्ष बांधले आणि सद्गुरूंच्या दर्शनाच्या इच्छेने ब्राह्मणांच्या परवानगीने ती त्या परमात्म्याची स्तुती करीत संगमाकडे निघाली.८२ त्या सतीच्या स्तुतीत सद्गुरूंवर परमेश्वरासारखी निष्ठा आहेच; पण तिचे दुःख, घोर निराशाही आहेत. सर्वसामर्थ्यशाली सद्गुरूंसमोर हे सर्व भाव व्यक्त करतांना तिने उपरोधाचाही अवलंब केला आहे. त्यामुळे ही स्तुती अत्यंत हृदयस्पर्शी झाली आहे.८३.

**मृतो जीवितो रुग्ण आरोग्यमाप्तो गतः शर्म भीतोऽपि दीनोऽर्थयुक्तः ।**
**गतः प्राज्ञतामज्ञ ईश प्रभावात्तवाहं धवाढ्याद्य सायुज्यमेष्ये ।।८४।।**
**एवं स्तुवन्ती पथि साञ्जनाश्रुलीढस्तनस्वर्णघटा हठात्स्वाम् ।**
**उद्धर्तुकामापि समं धवेन जवेन सागत्य हरिं ननाम ।।८५।।**
**आयान्तीं प्रणतां देवस्त्वं सौभाग्यवती भव । अष्टपुत्रा पुनश्चेति भगवान्प्रीत आह ताम् ।।८६।।**

'(हे) ईश, तव प्रभावात् मृतः जीवितः, रुग्णः आरोग्यं आप्तः, भीतः अपि शर्म गतः, दीनः अर्थ+युक्तः, अज्ञः प्राज्ञतां गतः। अद्य धव+आढ्या सायुज्यं एष्ये।'८४। एवं स्तुवन्ती स+अञ्जन+अश्रु+लीढ+स्तन+स्वर्ण+घटा हठात् स्वां धवेन समं उद्धर्तु+कामा अपि सा जवेन आगत्य हरिं ननाम।८५। देवः आयान्तीं प्रणतां तां 'त्वं सौभाग्यवती भव' इति आह। पुनः 'अष्ट+पुत्रा' इति च भगवान् प्रीतः आह।८६।

'हे भगवंता, तू साधूंचा आणि धर्माचा त्राता आहेस. तूच ब्रह्मा-विष्णू-शिव या तीन रूपांनी विश्वाच्या उत्पत्ती-स्थिती-लयांचा कर्ता आहेस, कारण तूच सर्वांचा ईश्वर आहेस. तुझी बिरुदावली त्रैलोक्यांत पसरलेली आहे. तूच श्रीहरी आणि तूच दयासागर दाता आहेस. तुझ्या कृपालेशाने किती तरी स्त्रियांना पती आणि पुत्र यांचे सुख लाभलेले आहे. आज मीसुद्धां पती आणि पुत्र यांचे सुखाने हर्ष पावून पूर्णकाम झाले आहे; आणि तुझी कीर्ती घेऊन स्वर्गाला जाते आहे!८४. 'देवा रे, तुझ्या प्रभावाने मेलेलाही (माझा पती) जिवंत झाला, रोग्याला आरोग्य मिळाले, आर्ताला सुख मिळाले, दरिद्री धनवान झाला आणि अज्ञानीही ज्ञानवान् झाला. आज मी पतीसह मी तुझे सायुज्य प्राप्त करीत आहे!८५. अशी उपरोधात्मक स्तुती करीत, काजळाने काळवंडलेल्या अश्रूंनी आपले सोन्याच्या घटासारखे स्तन भिजवीत, आपल्या व पतीच्या उद्धाराच्या तीव्र इच्छेने, वेगाने श्रीगुरूंसमोर येऊन तिने त्यांना नमस्कार केला. आपल्या समोर येऊन नमस्कार करणाऱ्या त्या सतीला पाहून श्रीगुरुदेव 'तूं सौभाग्यवती हो', असे म्हणाले; तसेच पुन्हा प्रेमाने 'अष्टपुत्रा हो' असेही म्हणाले.८६.

**तच्छ्रुत्वा चकिता लोकाः शशंसुः सर्वमादितः । प्रभुः प्राह न मे वाक्यं मोघं शवमिहानय ।।८७।।**
**अत्रान्तरे द्विजा एत्य रौद्र्यानर्चुर्गुरुं तदा । आनीतं शवमुद्वीक्ष्य सुधादृष्ट्या स्वसंनिधौ ।।८८।।**
**स्थापयित्वा स तं रौद्र-मन्त्रिताद्भिस्तनुं समाम् । स्नापयामास सोऽकस्मात् सुप्तोत्थितवदुत्थितः ।।८९।।**
**तदा हर्षाश्रुपूर्णाक्षी लज्जितं विस्मितं पतिम् । प्रेम्णा शशंस तत्सर्वमूचतुः प्राञ्जली उभौ ।।९०।।**

तत् श्रुत्वा चकिताः लोकाः सर्वं आदितः शशंसुः। प्रभुः प्राह, 'मे वाक्यं मोघं न। शवं इह आनय।'८७। अत्र+अंतरे द्विजा एत्य गुरुं रौद्र्यान् अर्चुः। तदा आनीतं शवं सुधा+दृष्ट्या उद्वीक्ष्य तं स्व+संनिधौ।८८। स्थापयित्वा, सः समां तनुं रौद्र+मंत्रित+अद्भिः स्नापयामास। सः अकस्मात् सुप्त+इत्थित इव उत्थितः।८९। तदा लज्जितं विस्मितं पतिं हर्ष+अश्रु+पूर्ण+अक्षी तत् सर्वं प्रेम्णा शशंस। उभौ प्राञ्जलिः ऊचतुः।९०।

ते ऐकून विस्मित झालेल्या लोकांनी श्रीगुरूंना पहिल्यापासून सर्व हकीकत सांगितली. प्रभू म्हणाले, 'माझे वचन कधीच निष्फल होत नाही. ते प्रेत इथे घेऊन या.'८७. इतक्यात ब्राह्मणांनी येऊन श्रीगुरूंची रुद्रमंत्रांनी पूजा केली. तोपर्यंत लोकांनी आणलेल्या प्रेतावरून आपली अमृतदृष्टी फिरवून ते शव आपल्याजवळ ठेवायला लावले,८८. आणि त्याला रौद्रमंत्रांनी अभिमंत्रित केलेल्या जलाने स्नान करविले. त्या वेळी तो सतीचा मृत पती झोपेतून उठावा तसा अकस्मात् उठून बसला.८९. तेव्हां सर्व लोकांना लाजणाऱ्या आणि विस्मित झालेल्या आपल्या पतीला त्या सतीने आनंदाश्रूंनी पाणावलेल्या डोळ्यांनी सर्व कांही सांगितले. त्या वेळी त्या दोघांनीही हात जोडून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली.९०.

**आवां स्वो दुर्धियौ पापौ भवत्स्मृतिपरायुखौ । तथापि त्वं दयासिन्धो सच्चिदानन्द हंसि नो ।।९१।।**
**जगद्गुरो विश्वमूर्ते परमात्मन्त्राहि विश्वप । विश्वसाक्षिन्विश्वसंस्थ सर्वानन्दनिधे हरे ।।९२।।**
**कर्ताऽकर्ताऽन्यथाकर्ता त्वमेवासि पुमर्थदः । आवाभ्यामपराद्धं तत् क्षामये त्वाद्य कात्स्न्र्यतः ।।९३।।**
**एवं तौ बहुशो नत्वा प्रणतीश्चक्रतुर्मुदा । तच्चित्रं प्रेक्ष्य लोकोऽपि तुष्टाव परमेश्वरम् ।।९४।।**

'आवां दुर्धियौ, पापौ, भवत्+स्मृति+पराङ्मुखौ स्वः। तथापि (हे) दया+सिन्धो (हे) सच्चिदानंद, त्वं नो हंसि।'।९१। '(हे) जगद्+गुरो, विश्व+मूर्ते, परमात्मन्, विश्व+प, विश्व+साक्षिन्, विश्व+संस्थ, सर्व+आनन्द+निधे, हरे, त्राहि।९२। त्वं एव कर्ता, अकर्ता, अन्यथा+कर्ता, पुं+अर्थदः असि। आवाभ्यां अपराद्धं तत् अद्य त्वां कात्स्न्र्येन क्षामये।'९३। एवं तौ बहुशः मुदा नत्वा प्रणतीः चक्रतुः। तत् चित्रं प्रेक्ष्य लोकः अपि परमेश्वरं तुष्टाव।९४।

'आम्ही पापी आणि दुष्ट बुद्धीचे असून तुझ्या स्मरणालाही विमुख आहो. तरी हे दयासागरा, सच्चिदानंदा, तू आमचा घात न करता रक्षणच करतोस.'९१. 'अहो जगद्गुरो, विश्व हेच ज्यांचे मूर्त स्वरूप आहे अशा परमात्मा, जगाचे पोषण करणाऱ्या, जगत्साक्षी, जगच्या अधिष्ठाना, सर्व आनंदाच्या निधाना, हरे, आमचे रक्षण कर.९२. तूच कर्ता, अकर्ता, अन्यथाकर्ता तसेच सर्व पुरुषार्थांचा दाता आहेस. आमचे उभयतांच्या सर्वही अपराधांची आज क्षमा मागते.' (एकवचनी क्रियापदाच्या योजनेवरून ही क्षमायाचना ती सती करते आहे असे समजावे.)९३. अशा तऱ्हेने त्या दंपतीने श्रीगुरूंना आनंदभराने वारंवार वाकून अनेक वेळा नमस्कार केला. हा चमत्कार पाहून तिथे जमलेल्या लोकांनीही श्रीगुरुदेवांची स्तुती केली.९४.

**तत्रैको धूर्त आहेशं केऽस्ति ब्रह्मलिपिर्न वा । नाल्पो मृत्युर्महानेष सास्ति चेज्जीवितः कुतः ।।९५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धात्रात्र लिखितं त्रिंशदायुरेष्यभवे शतम् । याच्ञयैष्यं शतं त्वत्र गृहीत्वा व्यस्तमाचरम् ।।९६।।**
**तच्छ्रुत्वा मिलिता लोका उच्चैश्चक्रुर्जयध्वनिम् । स्वर्वासिश्रोत्रविवर-विश्रान्तिमघमर्षणम् ।।९७।।**
**दम्पती प्राह भगवानायुष्मन्तौ निरामयौ । सुपुत्रधनकीर्त्याढ्यौ लोकवन्द्यौ भविष्यतः ।।९८।।**

तत्र एको धूर्तः ईशं आह। के ब्रह्म+लिपिः अस्ति वा न? एष मृत्युः अल्पः न, महान (अस्ति)। (लिपिः) अस्ति चेत् सः कुतः जीवितः?९५। श्रीगुरुः उवाच । अत्र धात्रा त्रिंशत् आयुः लिखितम्। एष्य+भवे शतम्। अत्र तु याच्ञया एष्यं शतं गृहीत्वा व्यस्तं आचरम्।९६। तत् श्रुत्वा मिलिता लोकाः उच्चैः स्वः+वासि+श्रोत्र+विवर+विश्रान्तिं अघमर्षणं जय+ध्वनिं चक्रुः।९७। भगवान दम्पती प्राह, 'आयुष्मन्तौ, निरामयौ, सुपुत्र+धन+कीर्ति+आढ्यौ लोक+वन्द्यौ भविष्यतः।'९८।

तिथे एक धूर्त (चिकित्सक, बुद्धिवादी) होता. तो श्रीगुरूंना म्हणाला, 'कपाळावर ब्रह्मदेवाचा लेख असतो की नाही? हा कांही टाळता येण्यासारखा अल्प मृत्यू नव्हता. दीर्घकाळ क्षयानंतर आलेला हा मृत्यू महान - काळमृत्यूच असला पाहिजे. जर ब्रह्मदेवाने हेच त्याच्या कपाळी लिहिले असेल तर कसा जिवंत झाला?'९५. श्रीगुरूंच्या अघटितघटनापटुत्वाची एवढी प्रत्यक्ष प्रचीती आलेली असूनही श्रद्धेच्या अभावी त्याने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर श्रीगुरू त्याच्याच भाषेत देत आहेत. ते म्हणाले, 'खरे आहे, ब्रह्मदेवाने या जन्मात याला तीस वर्षेच आयुष्य लिहिलेले आहे. पण पुढच्या जन्मात शंभर वर्षे आयुष्य लिहिलेले आहे. ते मागून घेऊन आम्ही या जन्मात शंभर व पुढच्या जन्मात तीस अशी अदलाबदल केली आहे.'९६. ते ऐकून तिथे जमलेल्या लोकांनी जो पापनाशक जयजयकार केला तो स्वर्गांतील देवांच्या कर्णरंध्रांत जाऊनच विसावला.९७. श्रीगुरू भगवान त्या दंपतीला म्हणाले, 'तुम्ही दीर्घायुषी, आरोग्यसंपन्न, पुत्रवान, धनसंपन्न, कीर्तिमान होऊन लोकांत पूज्यता पावाल.'९८.

**श्रुत्वा गुरोर्गां प्रमुदान्वितावुभौ स्नात्वा गुरोश्चक्रतुरर्चनं तदा ।**
**अस्तं गतोऽर्कोऽप्यज आह्निकीं क्रियां कृत्वा मठं सर्वजनैः सहाययौ ।।९९।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे मृतसंजीवनं नाम तृतीयोऽध्यायः ।।३।।**

**आदितः षोडशोऽध्यायः ।।१६।। ।। श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ।। ।। श्रीगुरुदेव दत्त ।।**

गुरोः गां श्रुत्वा तौ उभौ प्रमुदितान् स्नात्वा गुरोः अर्चनं चक्रतुः। तदा अर्कः अपि अस्तं गतः। अजः आह्निकीं क्रियां कृत्वा सर्वजनैः सह मठं आययौ।९९।

हे श्रीगुरूंचे आशीर्वचन हे ऐकून त्या दंपतीला अत्यंत हर्ष झाला. त्यांनी स्नान करून श्रीगुरूंचे पूजन केले. एवढ्यांत सूर्यही अस्तमानाला गेला. श्रीगुरूंनीही सायंकाळचे आह्निक केले आणि सर्व लोकांसह मठांत परतले.९९.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला तिसरा आणि प्रथमपासून सोळावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। सप्तदशोऽध्यायः ।।

## ।। सिद्ध उवाच ।।

**अन्येद्युराह साध्वीशं पूर्वेद्युः कश्चनैत्य सन् । तत्त्वज्ञानेन माश्वास्य भस्माक्षान्चतुरो ददौ ।।१।।**
**प्राह दृष्ट्वा गुरूं तीर्थैः पतिं प्रोक्ष्यानुयाहि तम् । इत्युक्त्वागात्स कस्तीर्थ-रुद्राक्षमहिमा कियान् ।।२।।**

## ।। श्रीगुरुरुवाच ।।

**रूपान्तरेण ते भावो मयैवाङ्ग परीक्षितः । धन्यासि सुभगे साध्वि तीर्थाक्षमहिमा त्वियान् ।।३।।**

सिद्ध उवाच। अन्येद्युः साध्वी ईशं आह। पूर्वेद्युः कश्चन सन् एत्य मां तत्त्वज्ञानेन आश्वास्य भस्म (एवं) चतुरः अक्षान् ददौ।१। (सः) प्राह, गुरुं दृष्ट्वा पतिं तीर्थैः प्रोक्ष्य तं अनुयाहि। इति उक्त्वा अगात्। सः कः? तीर्थ-रुद्राक्ष+महिमा कियान्?२। श्रीगुरुः उवाच। (हे) अङ्ग, मया एव रूपान्तरेण ते भावः परीक्षितः। (हे)साध्वि, सुभगे, धन्या असि! तीर्थ+अक्ष+महिमा तु इयान्।३।

श्रीगणेशाय नमः। *रुद्राक्षाचे आणि भस्माचे माहात्म्य सतरावीं सतीप्रती। मंत्रोपदेशाचा न अधिकार स्त्रियांना म्हणुनी सोमवारव्रत उपदेशिती।।* सिद्ध पुढे नामधारकाला सांगतात. दुसऱ्या दिवशी त्या साध्वीने श्रीगुरूंना विचारले, ‘काल कुणी एक साधूंनी येऊन माझे तत्त्वज्ञानाच्या उपदेशाने सांत्वन केले आणि मला भस्म आणि चार रुद्राक्ष देऊन (१) सांगितले की, ‘श्रीगुरूंचे दर्शन घेऊन त्यांचे पादतीर्थ पतीच्या शवावर शिंपून मग तू सहगमन कर.’ ते साधू कोण होते? आणि त्या रुद्राक्षांचा तसेच तीर्थाचा काय महिमा आहे?२. श्रीगुरू म्हणाले, ‘हे बाळे, मीच दुसऱ्या रूपाने तुझ्या भक्तीची परीक्षा पाहिली. हे भाग्यवती साध्वी, तू खरेच धन्य आहेस! रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा असा आहे.’३.

**तन्माहात्म्यं कोऽत्र वक्ति भूषेशस्यामृतत्वदा । नृणामेकादिवक्त्राक्षा गङ्गास्नानादिपुण्यदाः ।।४।।**
**वराः स्युर्धातुरत्नाढ्याः शिव एव सहस्रधृक् । नाक्षैर्विना पुण्यलब्धिः पापनाशोऽक्षधारणात् ।।५।।**
**ईशनामाक्षभस्माढ्यो दुर्धरो मरुतामपि । जपेऽक्षाः प्राज्यफलदा ना भस्माक्षैर्विना पशुः ।।६।।**
**दन्ताभ्राब्ध्यर्कनृपभू-क्ष्मार्काष्टाशोन्मिताक्षतः । कण्ठकश्रुतिदोश्चूडा-दृक्करोरांसि भूषयेत् ।।७।।**

तन्+माहात्म्यं अत्र कः वक्ति ? ईशस्य अमृतत्वदा भूषा। नृणां एकादि+वक्त्र+अक्षाः गङ्गा+स्नान+आदि पुण्यदाः।४। धातु+रत्न+आढ्याः वराः स्युः। सहस्रधृक् शिव एव। अक्षैः विना पुण्य+लब्धिः न। अक्ष+धारणात् पापनाशः।५। ईश+नाम+अक्ष+भस्म+आढ्यः मरुतां अपि दुर्धरः। जपे अक्षाः प्राज्य+फलदाः। भस्म+अक्षैः विना ना पशुः।६। दन्त+अभ्र+अब्धि+अर्क+नृप+भू+क्ष्मा+अर्क+अष्टाशोन्मित अक्षतः कण्ठ+क+श्रुति+दोः+चूडा+दृक्+कर+ऊर+अंसि भूषयेत्।७।

भगवान शंकरही ज्या रुद्राक्षांना भूषण म्हणून धारण करतात अशा मोक्षप्रद रुद्राक्षांचे माहात्म्य कोणाला बरे सांगता येईल? एकमुखी, पंचमुखी, एकादशमुखी, चतुर्दशमुखी इत्यादि प्रकारचे रुद्राक्ष गंगास्नानादिकांचे पुण्य देतात.४. सुवर्णादि धातूंनी किंवा रत्नांनी मढविलेले रुद्राक्ष उत्तम होत! एक हजार रुद्राक्ष धारण करणारा पुरुष शिवसदृश होतो. रुद्राक्ष धारण न करता कुठलेही पुण्य घडत नाही. केवळ रुद्राक्ष घातल्याने पापांचा क्षय होतो.५. मुखांत शिवनाम, शरीरावर रुद्राक्ष आणि अगावर भस्म धारण करणारा देवांनासुद्धा अजेय आहे. रुद्राक्षाच्या माळेने जप केल्यास अनंत फळ मिळते. भस्म आणि अक्ष रहित पुरुषही पशूसमानच होय.६. ३२ (*दंत*) रुद्राक्ष गळ्यांत, २४ (*अभ्राब्धि*) मस्तकावर, १२ (*अर्क*) कानांवर, १६ (*नृप*) बाहूंवर, १ (*भू*) शेंडीला, १ (*क्ष्मा*) डोळ्यांच्या मधे - भ्रूमध्यावर डोक्यावरून दोऱ्याने बांधून सोडलेला, १२ (*अर्क*) हातांवर आणि एकशे आठ रुद्राक्षांची माळ छातीवर याप्रमाणे धारण करावेत.७.

**काश्मीरे भद्रसेनस्य सुतस्तन्मन्त्रिणोऽप्युभौ । भूषां मत्वाश्मवत्स्वक्षान् बाल्येऽपि दधतुर्मुदा ।।८।।**
**शाक्त्यो राजाग्रहात्प्राह तद्धेतुं शृणु भूपते । नन्दिग्रामे पुरा तन्वी वारमुख्येन्दुभा सती ।।९।।**
**गजाश्वधनदाराढ्या धर्मज्ञा दानतत्परा । तन्नाट्यमण्डपे त्वेतौ साक्षौ मर्कटकुक्कुटौ ।।१०।।**
**शिवोऽस्या वैश्यरूपेण पातिव्रत्यं परीक्षितुम् । धृत्वाप कङ्कणं लिङ्गं भास्वद्वेश्याऽब्रवीत्सखीम् ।।११।।**

काश्मीरे भद्रसेनस्य सुतः, तत्+मंत्रिणः अपि, उभौ भूषां अश्मवत् मत्वा बाल्ये अपि सु+अक्षान् मुदा दधतुः।८। शाक्त्यः राज+आग्रहात् तत् हेतुं प्राह। (हे) भूपते, पुरा नन्दिग्रामे इन्दु+भा सती वारमुख्या (अभूत्)।९। (सा) गज+अश्व+धन+दारा+आढ्या धर्मज्ञा, दानतत्परा। तत् नाट्य+मंडपे तु एतौ स+अक्षौ मर्कट+कुक्कुटौ।१०। शिवः अस्य पातिव्रत्यं परीक्षितुं वैश्यरूपेण कङ्कणं (च) भास्वत् लिङ्गं धृत्वा आप। वेश्या सखीं अब्रवीत्।११।

रुद्राक्षमाहात्म्याची कथा सांगत आहेत. काश्मीरचा राजा भद्रसेन याचा मुलगा तसेच त्याच्या मंत्र्याचाही मुलगा ह्या दोघांनाही लहानपणापासून अलंकारांची नावड होती. ते त्यांना दगडासारखे वाटायचे. मात्र चांगले चांगले रुद्राक्ष मिळवून ते मोठ्या आवडीने धारण करीत.८. भद्रसेन राजाकडे एकदा पराशर ऋषी आले. राजाने वारंवार आग्रह केल्याने त्यांनी त्याला त्या बालकांच्या ह्या जगावेगळ्या वर्तनाचे कारण सांगितले. ते म्हणाले, 'पूर्वी नन्दिग्राम नावाच्या गावी एक सद्वर्तनी वेश्या राहत होती.९. ती हत्ती, घोडे, पैसा दास, दासी इत्यादींनी संपन्न असून धर्म जाणणारी, त्याप्रमाणे वागणारी आणि दानतत्पर होती. तिच्या रंगमहालांत तिने पाळलेले हे दोघे माकड आणि कोंबडा रुद्राक्षांनी सजविलेले होते.१०. ती वेश्या असूनही स्वतःला पतिव्रता मानत असे; आणि पातिव्रत्यधर्माचे पालन करीत असे. एकदा तिच्या पातिव्रत्याची परीक्षा पाहण्यासाठी भगवान शंकर एका व्यापाऱ्याचे रूप घेऊन हातांत कङ्कण आणि तेजस्वी शिवलिंग धारण करून तिथे आले. त्यांना घरापुढून जाताना पाहून वेश्या आपल्या सखीला म्हणाली.११.

**परिपृच्छैनमर्घाच्चेद् रत्या वा दास्यति त्र्यहम् । साध्वीत्वेन वधूर्भूत्वा रमयाम्यस्मि पद्मिनी ।।१२।।**
**श्रुत्वोचे स तथा पृष्टं स्वैरिण्यां सत्यता कुतः । युष्माकं कुलधर्मस्तु व्यभिचारो हि केवलम् ।।१३।।**

**।। वेश्योवाच ।।**

**न स्वैरिणीयं साध्व्येव लिङ्गं तत्र प्रमा खलु । अहं त्र्यहं सतीत्वेन भजे त्वां सर्वभावतः ।।१४।।**

**।। वैश्य उवाच ।।**

**गृहाणेदं पुष्पवन्तौ साक्षिणावत्र मेऽसुवत् । स्ववाक्यं दृढभक्त्यैव विचारय पुनः पुनः ।।१५।।**

'एनं परिपृच्छ अर्घात् रत्या वा (इदं लिङ्गं) दास्यति चेत् अहं त्रि+अहं तस्य साध्वीत्वेन वधूः भूत्वा रमयामि। पद्मिनी अस्मि।'१२। तथा पृष्टं श्रुत्वा सः ऊचे, 'स्वैरिण्यां सत्यता कुतः? युष्माकं कुलधर्मः तु केवलं व्यभिचारः।'।१३। वेश्या उवाच। 'इयं न स्वैरिणी, साध्वी एव। तत्र लिङ्गं प्रमा खलु। अहं त्रि+अहं त्वां सर्वभावतः सतीत्वेन भजे।'१४। वैश्य उवाच, 'इदं मे असुवत् गृहाण। अत्र पुष्पवन्तौ साक्षिणः। स्ववाक्यं दृढ+भक्त्या एव पुनः पुनः विचारय।'१५।

'या व्यापाऱ्याला विचारा की त्याचे ते शिवलिंग तो विकत किंवा संभोगाच्या मोबदल्यांत देईल कां? तसे असेल तर मी तीन दिवस त्याची पत्नी होईन आणि पातिव्रत्याने त्याला सुखवीन. मी पद्मिनी आहे.' (*पद्मिनी* म्हणजे कामशास्त्रानुसार उत्तम स्त्री.)१२.

त्या व्यापाऱ्याला तसे विचारले असता तो म्हणाला, 'तुम्हा स्वैराचारी वेश्यांचे बोलणे कसे खरे मानायचे? व्यभिचार हाच तर तुमचा कुळाचार आहे.'१३. ती वेश्या म्हणाली की, 'मी स्वैरिणी नसून खरोखर साध्वीच आहे. या लिंगाची भाक घेऊन सांगते की मी तीन दिवसपर्यंत तुमची एकनिष्ठ पत्नी म्हणून राहीन.'१४. तो वैश्य म्हणाला, 'ठीक आहे तर! हे माझे प्राणप्रिय लिंग सूर्य आणि चंद्रांना साक्षी ठेवून घे. आपल्या वचनावर दृढ भक्तीने वारंवार विचार कर!'१५.

**इत्युक्त्वा तत्करे बध्वा कङ्कणं लिङ्गमर्पयत् । साध्वीत्वेनापि सा भेजे लिङ्गं संस्थाप्य मण्डपे ।।१६।।**
**सलिङ्गो मण्डपो दग्धोऽग्निनाकस्माद्रतिक्षणे । सकीशकुक्कुटो वैश्यो जुहावाग्नौ तनुं तदा ।।१७।।**
**वेश्याऽपि भर्तृनाशार्ता कुलाचारविरुद्धताम् । मा भजेति निषिद्धाऽपि स्वैः सिद्धानुगमेऽभवत् ।।१८।।**
**दत्वा दानानि नत्वार्कं ध्यात्वेशं वह्निमाविशत् । प्रादुर्भूतस्तदा त्र्यक्षः पञ्चास्यः प्राह पङ्क्तिदोः ।।१९।।**
**मायामुद्भाव्य ते सर्वं मयेशेन परीक्षितम् । वारमुख्यापि साध्वी त्वं प्रीतोऽस्मि वरयेप्सितम् ।।२०।।**

इति उक्त्वा तत्+करे कङ्कणं बध्वा लिङ्गं अर्पयत्। सा अपि लिङ्गं मण्डपे संस्थाप्य (तं) साध्वीत्वेन भेजे।१६। रतिक्षणे अकस्मात् स+कीश+कुक्कुटः सलिङ्गः मंडपः अग्निना दग्धः। तदा वैश्यः अग्नौ तनुं जुहौ।१७। वेश्या अपि भर्तृ+नाश+आर्ता, स्वैः 'कुलाचार+विरुद्धतां मा भज' इति निषिद्धा अपि अनुगमे सिद्धा अभवत्।१८। दानानि दत्वा, अर्कं नत्वा, ईशं ध्यात्वा (सा) वह्निं आविशत्। तदा त्रि+अक्षः पञ्च+आस्यः पङ्क्ति+दोः प्रादुर्भूतः प्राह।१९। मया ईशेन मायां उद्भाव्य ते सर्वं परीक्षितम्। वारमुख्या अपि त्वं साध्वी। प्रीतः अस्मि। ईप्सितं वरय।२०।

असे बोलून त्याने तिच्या हातांत कङ्कण बांधून ते लिंग तिला दिले. तिनेसुद्धा ते लिंग मंडपांत ठेवले आणि त्याच्या बरोबर पत्नीधर्माने अंतर्गृहात गेली.१६. संभोगाच्या वेळी अचानक त्या मंडपाला आग लागली आणि तिथे ठेवलेले ते लिंग आणि ते माकड आणि कोंबडाही जळून भस्म झाले. ते पाहून त्या वैश्यानेही त्या अग्नीत आपले शरीर अर्पण केले.१७. पतीच्या मृत्यूने तळमळणारी ती वेश्याही पतीबरोबर सहगमन करण्यास निघाली. तिच्या स्वकीयांनी तिला खूप समजावले की 'आपल्या कुलधर्माच्या विरुद्ध असलेले कर्म तू करू नकोस.' पण तिने कुणाचेही ऐकले नाही.१८. यथाविधी दाने आणि वाणे देऊन, सूर्यनारायणाला नमस्कार करून भगवान शंकरांचे ध्यान करीत तिने अग्नीत प्रवेश केला. त्या वेळी तीन नेत्र, पाच मुखे आणि दहा भुजा असलेले भगवान शिव तेथे प्रकटले आणि म्हणाले.१९. 'मीच मायेने हे सर्व दाखवून तुझे धर्म, धैर्य आदींची परीक्षा पाहिली. तू वेश्या असलीस तरी खरोखर साध्वीच आहेस. मी प्रसन्न झालो आहे. तुला इष्ट असा वर मागून घे.'२०.

**जैह्व्यौपस्थ्यं सुखं क्वापि न काङ्क्षे मे स्वकैः समम् । सायुज्यं तेऽर्पयेत्यूचे सा शिवोऽपि तथाऽकरोत ।।२१।।**
**तौ कीशकुक्कुटावेतौ पूर्वसंस्कारकारणात् । एतौ स्तोऽक्षप्रियौ शैवौ मताश्मसमभूषणौ ।।२२।।**
**तच्छ्रुत्वा भावि मे सूनोर्मुने शंसेति पृच्छते । राज्ञे तस्य मृतिर्नूनं सप्ताहादिति सोऽब्रवीत् ।।२३।।**
**मुहू राज्ञातिखिन्नेन प्रणतेनार्थितोऽब्रवीत् । पराशरऋषिर्मा भी राजन् रुद्रोऽस्ति तारकः ।।२४।।**
**स्रष्ट्रा सृष्टौ जगद्वृद्ध्यै धर्माधर्मौ तयोः पती । इन्द्रान्तकौ तौ स्वरधो-नेतारौ धन्यपापिनाम् ।।२५।।**

'जैह्व्य+औपस्थ्यं सुखं क्व अपि न कांक्षे। मे स्वकैः समं ते सायुज्यं अर्पय,' इति सा ऊचे। शिवः अपि तथा अकरोत्।२१। एतौ तौ कीश+कुक्कुटौ पूर्व+संस्कार+कारणात् अक्षप्रियौ मत+अश्म+सम+भूषणौ शैवौ स्तः।२२। तत् श्रुत्वा, (हे) मुने, मे सूनोः भावि शंस इति पृच्छते राज्ञे, तस्य नूनं सप्ताहात् मृतिः इति सः अब्रवीत्।२३। मुहु अति+खिन्नेन प्रणतेन राज्ञा अर्थितः पराशरऋषिः अब्रवीत्। '(हे) राजन्, मा भीः। रुद्रः तारकः अस्ति।२४। स्रष्ट्रा जगद्+वृद्ध्यै धर्म+अधर्मौ सृष्टौ। तयोः पती इन्द्र+अन्तकौ। तौ धन्य+पापिनां स्वः+अधो+नेतारौ।२५।

'जीभ आणि लिंग इत्यादींपासून होणाऱ्या ऐंद्रिय सुखाची, मग ते ऐहिक असो की पारलौकिक, मला मुळीच इच्छा नाही. मला माझ्या स्वकीयांसह आपले सायुज्य द्या,' असे ती वेश्या म्हणाली. भगवान शंकरांनी त्याचप्रमाणे तिला सपरिवार सायुज्य मुक्ती दिली.२१. हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा दोघे, तेच मंडपांत जळून गेलेले मर्कट आणि कुक्कुट आहेत. पूर्वजन्मीच्या संस्कारामुळे हे रुद्राक्षांची आवड असलेले आणि रत्नालंकारांना पाषाणासारखे तुच्छ मानणारे शिवभक्त झाले आहेत.'२२. ते आपल्या मुलाचे पूर्ववृत्त ऐकून राजाने विचारले की, 'ऋषिमहाराज, माझ्या मुलाचे भविष्य सांगा.' तेव्हां पराशर मुनींनी उत्तर दिले की, 'तुझ्या मुलाचा अवघ्या सात दिवसांनी मृत्यू होईल.'२३. ते ऐकून अत्यंत दुःखी झालेल्या राजाने वारंवार नमस्कार करून ह्या आपल्या मुलाच्या प्राणांसाठी प्रार्थना केली. त्यावर पराशर ऋषींनी त्याला धीर देत सांगितले, 'राजा! भिऊ नकोस. रुद्राध्याय तारक आहे.'२४. ब्रह्मदेवाने जगताच्या विस्तारासाठी धर्म आणि अधर्म निर्माण केले. धर्माचा पती इंद्र आणि अधर्माचा पती यम, हे दोघे अनुक्रमे पुण्यवान् आणि पापी लोकांना स्वर्गाला आणि नरकाला घेऊन जातात.२५.

**यमसारथयः काम-मुखा नानाघहेतवः । तत्सारथ्याद्यमो लोकान् पापान्क्षिपति दुर्गतौ ।।२६।।**
**बुद्धीन्द्रियमनःसंस्था अमी कामादयोऽबलाः । भीरून्निघ्नन्ति यमित-गोहृद्धीनामगोचराः ।।२७।।**
**वेदान्स्रष्टाऽसृजत्तत्र दक्षास्योत्थयजुःश्रुतेः । महारुद्रोऽघहृल्लब्धो मुनिभिः प्रसृतस्ततः ।।२८।।**

काममुखा यमसारथयः नाना+अघ+हेतवः। तत्+सारथ्यात् यमः पापान् लोकान् दुर्गतौ क्षिपति।२६। बुद्धि+इंद्रिय+मनः+संस्था अमी कामादयः अबलाः भीरून् निघ्नन्ति। यमित+गो+हृत्+धीनां अगोचराः।२७। स्रष्टा वेदान् असृजत्। तत्र दक्ष+आस्य+उत्थ+यजुः+श्रुतेः मुनिभिः अघहृत् महारुद्रः लब्धः। ततः प्रसृतः।२८।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ हे यमाचे सहायक आहेत. हेच नानाविध पापांचे मूळ आहेत. त्यांच्या साह्याने यम पापी लोकांना नरकात टाकतो. 'माणसाला पापाला प्रवृत्त करणारे कोण आहेत?' या अर्जुनाच्या प्रश्नाला 'रजोगुणापासून उद्भवणारे हे महापापी आणि खादाड काम आणि क्रोधच वैरी आहेत.' असे भगवंतांनी उत्तर दिले आहे (*काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।* भ.गीता ३:३७).२६. हे कामादि यमाचे सेवक बुद्धी, इंद्रिये आणि मन यांच्या आश्रयाने राहतात (*इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।* भ.गीता ३:४०). तसे ते निर्बळच आहेत; पण भित्र्या लोकांचा घात करतात. मात्र इंद्रिये, मन आणि बुद्धी यांच्यावर नियंत्रण ठेवणाऱ्यांच्या ते वाऱ्यालाही उभे राहत नाहीत. कठोपनिषदांत (१:३:१०-११) सांगितल्याप्रमाणे इंद्रियांपेक्षा विषय श्रेष्ठ आहेत. विषयांहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहेत. आत्मा सर्वांहून वर असल्याने इंद्रियादींचे नियमन करणाऱ्या आत्मसाधकांना कामादींचे दर्शनही होत नाही हे उघडच आहे.२७. श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितल्याप्रमाणे (६:१८) ईश्वराने वेद निर्माण केले. ब्रह्मदेवाच्या उजव्या मुखापासून यजुर्वेदाची उत्पत्ती झाली. त्याच्यातून ऋषीमुनींना पापनाशक अशा महान् रुद्राध्यायाची प्राप्ती झाली. ती त्यांनी शिष्य-प्रशिष्यपरंपरेने प्रसृत केली.२८.

**विप्रा यत्र पठन्त्येतं कामाद्याः सकला न तम् । देशं शेकुरपि द्रष्टुं याम्यं शून्यमभूत्पुरम् ।।२९।।**
**यमः शशंस तद्धात्रे स्वपन्तिष्ठन्व्रजन्कुधीः । मत्तोऽभक्तिर्जपति चेत्स पापी शाधि तं भृशम् ।।३०।।**
**तद्भिन्नान्जापकान् रुग्णान्मा प्रेक्ष मृतिगानपि । श्रीविदारोग्यादिभाजस्त इत्याह यमं विधिः ।।३१।।**
**तस्मान्मृत्युञ्जयस्त्राता मा भीः सद्ब्रह्मतः शिवे । अतिरुद्राभिषेकात्स भवेद्भूपायुतायुरित् ।।३२।।**

यत्र विप्रा एतं पठन्ति तं देशं कामाद्याः सकलाः द्रष्टुं अपि न शेकुः। याम्यं पुरं शून्यं अभूत्।२९। यमः तत् धात्रे शशंस। (स आह) 'स्वपन् तिष्ठन्, व्रजन्, कुधीः मत्तः अभक्तिः जपति चेत् सः पापी। तं भृशं शाधि।'३०। तद्+भिन्नान् जापकान् रुग्णान्, मृतिगान् अपि मा प्रेक्ष। ते श्री+वित्+आरोग्य+आदि+भाजः, इति विधिः यमं आह।३१। तस्मात् मृत्युञ्जयः त्राता, मा भीः। (हे)भूप, सद्+ब्रह्मतः शिवे अतिरुद्राभिषेकात् सः अयुत+आयुः भवेत्।३२।

जिथे ब्राह्मण या रुद्राध्यायाचे पठण करीत त्या देशाकडे कामादि सर्व पाहूही शकले नाहीत. अर्थात् यमपुरीतील सर्व नरक ओस पडले.२९. यमाने ही गोष्ट ब्रह्मदेवांना सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'जे कुणी ह्या रुद्राध्यायचा पाठ झोपून, उभ्याने, चालत, लोभाविष्ट बुद्धीने किंवा माझ्या भक्तीविना करतील ते पापी आहेत. त्यांना तू कठोर शासन कर.'३०.

'वर सांगितलेले सोडून इतर जे जापक असतील, ते जरी आजारी, अगदी मरायला टेकलेले असले तरी त्यांच्याकडे पाहूसुद्धा नकोस. त्यांना संपत्ती, विद्या, आरोग्य इत्यादींची प्राप्ती होईल.' याप्रमाणे ब्रह्मदेवांनी यमाला आज्ञा केली.३१. पराशर ऋषी सांगत आहेत, अशा रीतीने मृत्यूला जिंकणारा रुद्र तारणारा आहे, भिऊ नकोस. राजा, चांगल्या ब्राह्मणांकडून शंकराला अतिरुद्राभिषेक केल्यावर हा तुझा मुलगा आणि मंत्र्याचा मुलगा ह्या दोघांचेही आयुष्य दहा हजार वर्षे होईल.३२.

**तच्छ्रुत्वा द्राक्समाहूय सद्विप्रानृष्यनुज्ञया । राजानुष्ठानमारेभे श्रद्धाभक्त्या यथाविधि ।।३३।।**
**पाशदण्डधराः प्राप्ता सप्तमेऽह्नि यमानुगाः । गूढाङ्गा मूर्छितः पुत्रस्तदा तदुपरि द्विजैः ।।३४।।**
**प्रक्षिप्तरौद्राम्बुतीर्थ-मन्त्रिताक्षतसम्भवैः । रौद्रैर्दूताः पराभूता जग्मुस्तेऽथोत्थितः सुतः ।।३५।।**
**प्रीतो राजा तदा विप्रान् भोजयित्वाभ्यतोषयत । सभां विरच्योपवेश्य स्वासने शाक्त्यमाभजत् ।।३६।।**
**रणद्वीणो हरिं गायन्तत्राप्तो नारदो नृपः । तं प्रत्युद्गम्य सम्पूज्य लोकोदन्तमपृच्छत ।।३७।।**

तत् श्रुत्वा राजा द्राक् ऋषि+अनुज्ञया विप्रान् समाहूय श्रद्धा+भक्त्या यथाविधि अनुष्ठानं आरेभे।३३। सप्तमे अह्नि पाश+दण्ड+धराः गूढ+अङ्गाः यम+अनुगाः प्राप्ता। तदा पुत्रः मूर्छितः। तत् उपरि द्विजैः।३४। प्रक्षिप्त+रौद्र+अम्बु+तीर्थ+मंत्रित+अक्षत+सम्भवैः रौद्रैः दूताः पराभूताः। ते जग्मुः। अथ सुतः उत्थितः।३५। प्रीतः राजा तदा विप्रान् भोजयित्वा अभि+अतोषयत्। सभां विरच्य शाक्त्यं स्वासने उपवेश्य आभजत्।३६। तत्र रणत्+वीणः नारदः हरिं गायन् आप्तः। नृपः तं प्रति उद्गम्य सम्पूज्य लोक+उदन्तं अपृच्छत।३७।

मुनिवरांचे बोलणे ऐकून राजाने त्यांच्याच अनुज्ञेने लगेच ब्राह्मणांना पाचारण केले. आणि श्रद्धेने व भक्तीपूर्वक यथाशास्त्र अतिरुद्राच्या अनुष्ठानाला प्रारंभ केला.३३. सातव्या दिवशी पाश आणि दंड धारण केलेले यमदूत अदृश्यतया आले. तेव्हां राजपुत्र मूर्छित झाला. त्याच्यावर ब्राह्मणांनी रुद्राभिषेकाच्या पाण्याचे तीर्थ आणि अक्षता टाकल्या. त्यांपासून उद्भवलेल्या रुद्रदूतांनी यमदूतांचा पराभव केला आणि ते यमदूत निघून गेले. मग तो राजपुत्र उठून बसला.३४-३५.

प्रमुदित राजाने विप्रांना भोजनादि देऊन दक्षिणादींनी त्यांचा सत्कार केला. मग त्याने राज्यसभा भरवून आपल्या उच्च आसनावर पराशर ऋषींना बसवून त्यांची पूजा केली.३६. इतक्यांत आपल्या वीणेचा झंकार करीत आणि हरिनामाचा गजर करीत नारद तिथे आले. राजाने सामोरे जाऊन त्यांचा सत्कार केला आणि त्यांना राजाने स्वर्गलोकाची वार्ता विचारली.३७.

**स प्राहात्र महामृत्युस् त्वत्पुत्रं हर्तुमागतः । शिवदूतैः सदूतः स पराभूतो यमं ययौ ।।३८।।**
**यमोऽपि तैः सहैत्यैशान् दूतान्प्राहेश्वराज्ञया । नियतं कर्तुमुद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः ।।३९।।**
**ऊचुस्तेऽदश्चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थो भवान्तक । स पट्टे द्वादशाब्देऽल्पं मृत्युं तीर्त्वायुतायुरित् ।।४०।।**
**भविष्यतीति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान्क्षमापयत् । दृष्टं मयेदं ते पुत्रस्त्रातः शाक्त्येन भूपते ।।४१।।**
**इत्युक्त्वा नारदोऽगात्स्वराशीर्भिरभिनन्द्य तौ । शाक्त्योऽप्यगात्स्वधामेयान्तीर्थाक्षमहिमा सति ।।४२।।**

स प्राह। 'अत्र महामृत्युः त्वत्+पुत्रं हर्तुं आगतः। शिव+दूतैः सदूतः पराभूतः सः यमं ययौ।३८। यमः अपि तैः सह एत्य ऐशान् दूतान् प्राह। 'ईश्वर+आज्ञया नियतं कर्तुं उद्युक्ते मयि यूयं क्व विघ्नदाः?'३९। ते ऊचुः। '(हे) अन्तक, अदः चित्रगुप्तं पृष्ट्वा स्वस्थः भव।' स पट्टे द्वादश+अब्दे अल्पं मृत्युं तीर्त्वा इत् अयुत+आयुः।४०। भविष्यति इति सम्प्रेक्ष्य भ्रान्तः शैवान् क्षमापयत्। '(हे) भूपते इदं मया दृष्टम्। ते पुत्रः शाक्त्येन त्रातः।'४१। इति उक्त्वा नारदः तौ आशीभिः अभिनन्द्य स्वः अगात्। शाक्त्यः अपि स्वधाम अगात्। (हे) सति, इयान् तीर्थ+अक्ष+महिमा।४२।

नारदमुनी म्हणाले, 'अरे राजा, आत्ता इथे महामृत्यू तुझ्या मुलाला घेऊन जायला आला होता. शिवदूतांनी त्याचा आणि त्याच्या दूतांचा पराभव केल्यावर तो यमराजाकडे गेला.३८. यमाने आपल्या दूतांचे म्हणणे ऐकले आणि तो शिवदूतांना येऊन म्हणाला, 'ईश्वराच्या आज्ञेने नेमून दिलेले कार्य मी करीत असता तुम्ही विघ्न करता हे योग्य नाही!'३९. ते शिवदूत त्याला म्हणाले, 'यमराज, ह्याची तुम्ही चित्रगुप्ताकडून खातरजमा करा ना!' तेव्हां यमधर्माने तुझ्या पुत्राचे खाते पाहिले. त्यांत असे लिहिले होते की, 'बाराव्या वर्षी अल्पमृत्यूपासून तरून तिथून पुढे तो दहा हजार वर्षे जगेल.' ते पाहून गोंधळात पडलेल्या यमाने शैवदूतांची क्षमा मागीतली. नारदमुनी पुढे म्हणाले, 'हे राजा, मी हे स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. तुझ्या मुलाला पराशरमुनींनीच जीवदान दिले आहे!'४०-४१. याप्रमाणे बोलून आणि त्या कुमारांचे आशीर्वादपूर्व अभिनंदन करून नारदमुनी स्वर्गाला गेले. पराशरही आपल्या घरी गेले. श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, हे सती, असा आहे रुद्रतीर्थाचा आणि रुद्राक्षाचा महिमा!४२.

|| सावित्र्युवाच ||

**यत्त्वद्दृग्गोचरा साक्षाज्जाता धन्यतमा गुरो । उपादिश मनुं मे ते पादाब्जस्मृतिहेतवे ||४३||**

|| श्रीगुरुरुवाच ||

**नोपदेश्यो मनुः स्त्रीणां पतिभक्तिस्तु तारका । दत्तोऽप्यनुपयुक्तः स्याद्दातुर्हानिश्च शुक्रवत् ||४४||**
**शृणु साध्वि पुरा देव-दैत्ययुद्धमभून्महत् । काव्यो मन्त्रजपाद्वज्रि-हतान्दैत्यानजीवयत् ||४५||**
**गत्वेन्द्रः शरणं शम्भुं तच्छशंस शिवेन तु । आनयित्वा कविर्लीढः सोऽपि मूत्राद्बहिर्गतः ||४६||**

सावित्री उवाच। '(हे) गुरो, यत् त्वत्+दृक्+गोचरा जाता धन्यतमा (अस्मि)। ते पाद+अब्ज+स्मृति+हेतवे मे मनुं उपादिश।'४३। श्रीगुरुः उवाच। 'स्त्रीणां पतिभक्तिः तु तारका, मनुः न उपदेश्यः, दत्तः अपि अनुपयुक्तः स्यात्। शुक्रवत् दातुः हानिः।'४४। '(हे) साध्वि, शृणु। पुरा महत् देव+दैत्य+युद्धं अभूत्। काव्यः मन्त्रजपात् वज्रि+हतान् दैत्यान् अजीवयत्।४५। इन्द्रः शंभुं शरणं गत्वा तत् शशंस। शिवेन तु कविः आनयित्वा लीढः। सः अपि मूत्रात् बहिः गतः।'४६।

सावित्री म्हणाली, 'गुरुमहाराज, आपल्या कृपाकटाक्षाने मी खरोखर धन्यातिधन्य झाले आहे! आपल्या पदकमलांचे स्मरण मला राहावे यासाठी आपण मला मंत्राचा उपदेश करावा.'४३. श्रीगुरू म्हणाले, 'स्त्रियांना पतिभक्ती हाच तरणोपाय आहे. स्त्रियांना मंत्र देऊ नये. दिला तरी व्यर्थच होतो. शिवाय शुक्रासारखी मंत्र देणाऱ्याचीही हानी होते.'४४. हे सती ऐक. पूर्वी देव आणि दैत्य यांचे मोठे युद्ध झाले. इंद्राच्या वज्राने दैत्यांचा संहार होत असे. पण दैत्यांचे गुरू शुक्राचार्य संजीवनी मंत्राचा जप करून त्या दैत्यांना पुनः जिवंत करीत.४५. इन्द्राने भगवान् शंकरांना शरण जाऊन हे त्यांच्या कानांवर घातले. शंकरांनी शुक्राचार्यांना आणून गिळून टाकले. पण तो कांही काळ शंकरांच्या पोटात राहून नंतर मूत्रद्वारे बाहेर पडला. पूर्वी दैत्यगुरूंचे नांव भार्गव असे होते; पण शिवाच्या शुक्राशी (वीर्याशी) संबंध आल्याने त्याचे नाव शुक्र असे पडले. स्कंद पुराणाच्या प्रभास खंडांत ही कथा आहे.४६.

**दैत्यानेत्य पुनः शुक्रस्तान्मृतानप्यजीवयत् । त्रस्तस्तदेन्द्रो धीमन्नः पाहीति प्रार्थयद्गुरुम् ।।४७।।**
**स प्राह तन्मनौ व्याजाद्भ्रंशिते वो जयो ध्रुवः । त्रिलोककण्टकोत्कर्षान् मन्त्रसारहृतिर्वरम् ।।४८।।**
**इत्युक्त्वा स कचं प्राह स्वसुतं गच्छ रे कविम् । विद्यार्थित्वेन तं तुष्ट्वा मन्त्रसारं तिरस्कुरु ।।४९।।**
**तं नत्वापि कचो गत्वा शुक्रं प्राहास्मि ते गुरो । शिष्यो मां प्रणतं शाधि पक्षित्वं मा निधा मयि ।।५०।।**
**एवमुक्तवतस्तस्य रूपसौन्दर्यमोहिता । शुक्रं प्रियात्मजोचेऽमुं शिष्यत्वेनोररीकुरु ।।५१।।**

शुक्रः पुनः दैत्यान् एत्य तान् मृतान् अपि अजीवयत्। तदा इन्द्रः त्रस्तः गुरुं धीमन् नः पाहि इति प्रार्थयत्।४७। स प्राह। 'तत्+मनौ व्याजात् भ्रंशिते (सति) वः जयः ध्रुवः। त्रिलोक+कंटक+उत्कर्षात् मंत्र+सार+हृतिः वरम्।'४८। इति उक्त्वा सः कचं प्राह। 'रे, कविं गच्छ। तं विद्यार्थित्वेन तुष्ट्वा मंत्रसारं तिरस्कुरु।'४९। तं नत्वा अपि कचः शुक्रं गत्वा प्राह। '(हे) गुरो, ते शिष्यः अस्मि। मां प्रणतं शाधि। मयि पक्षित्वं मा निधा।'५०। एवं उक्तवतः तस्य रूप+सौंदर्य+मोहिता प्रिया आत्मजा शुक्रं ऊचे। 'अमुं शिष्यत्वेन उरीकुरु।'५१।

शुक्राचार्य दैत्यांकडे परत आले आणि पुनः मृत दैत्यांना सजीव करू लागले. ह्यामुळे त्रासलेला इंद्र देवगुरू बृहस्पतींकडे गेला. आपण बुद्धिवंत आहांत, 'आमचे रक्षण करा' अशी त्याने प्रार्थना केली.४६. बृहस्पती म्हणाले, 'कांही तरी कपटाने त्या शुक्राचार्यांचा मंत्र भ्रष्ट करायला हवा. त्रैलोक्याला त्रासणाऱ्या या दैत्यांचा उत्कर्ष होण्यापेक्षा त्या मंत्राचे सारच घालवून टाकावे हे बरे!' दुर्जन वरचढ होऊ लागले तर त्यांच्या प्रतिकारासाठी कपटाचा आश्रय घेण्यांत दोष नाही, असा त्यांचा अभिप्राय.४८. असे इंद्राशी बोलून देवगुरू आपल्या पुत्राला - कचाला, म्हणाले, 'बाळा, तू शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांचे शिष्यत्व पत्कर. हर प्रकारे त्यांचे मन संतुष्टवून संधी साधून त्यांच्या मंत्राचा प्रभाव नष्ट कर.'४९. आपल्या पित्याला वंदन करून कच लगेच निघाला. शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांना नमस्कार करून म्हणाला, 'गुरुमहाराज, मी आपला शिष्य होऊं इच्छितो. नम्रपणे आपल्याला शरण आलों आहे. तरी आपण माझा अंगीकार करा. मी देवगुरूंचा पुत्र असलो तरी आपण दुजाभाव मनांत न ठेवतां माझे गुरु व्हा.'५०. कच शुक्राचार्यांशी असे बोलत असतांना, दैत्यगुरूंची एकुलती एक लाडकी कन्या देवयानी जवळच उभी होती. ती कचाच्या सुंदर रूपाने मोहित झाली आणि आपल्या पित्याला म्हणाली, 'बाबा, ह्याला शिष्य करून घ्या ना!'५१.

**तच्छ्रुत्वोशनसा सोऽपि तद्वात्सल्यादुरीकृतः । कचोऽपि सर्वभावेन शुक्रं गुरुमतोषयत् ।।५२।।**
**ज्ञात्वा तच्छाठ्यमसुराः समिदर्थं गतं वनम् । तं जघ्नुर्देवयान्याह शुक्रं नाप्तः कुतः प्रियः ।।५३।।**
**शुक्रोऽपि तं हतं ज्ञात्वा ध्यानान्मन्त्रप्रभावतः । जीवयित्वाऽऽनयद्गेहं कचं हृष्टाभवत्सुता ।।५४।।**
**मुहुर्दैत्या वने हत्वा हिंस्रेभ्यस्तत्पलं ददुः । तमदृष्ट्वैव शोचन्तीं कन्यामाश्वास्य भार्गवः ।।५५।।**
**ज्ञात्वा तं भक्षितं हिंस्रैस् तत्कुक्षेर्मन्त्रशक्तितः । कात्स्न्यान्निष्काश्य कृत्वैक्यं सजीवं पूर्ववद्व्यधात् ।।५६।।**

तत् श्रुत्वा उशनसा तत्+वात्सल्यात् सः अपि उरीकृतः। कचः अपि गुरुं शुक्रं सर्वभावेन अतोषयत्।५२। असुराः तत्+शाठ्यं ज्ञात्वा समिदर्थं वनं गतं तं जघ्नुः। देवयानी शुक्रं आह। 'प्रियः कुतः न आप्तः?'५३। शुक्रः अपि ध्यानात् तं हतं ज्ञात्वा, मंत्र+प्रभावातः जीवयित्वा कचं गेहं आनयत्। सुता हृष्टा अभवत्।५४। मुहुः दैत्याः (कचं) वने हत्वा तत्+पलं हिंस्रेभ्यः ददुः। तं अदृष्ट्वा शोचन्तीं कन्यां आश्वास्य भार्गवः।५५। तं हिंस्रैः भक्षितं ज्ञात्वा, मंत्र+शक्तितः तत्+कुक्षेः निष्काश्य ऐक्यं कृत्वा पूर्ववत् व्यधात्।५६।

तिचा आग्रह पाहून तिच्यावरील वात्सल्याने शुक्राचार्यांनी कचाला, तो देवगुरूंचा पुत्र असूनही शिष्य करून घेतले. कचानेही आपले गुरू शुक्राचार्यांची सर्व प्रकारे सेवा करून त्यांना प्रसन्न केले.५२. मात्र असुरांना हे कचाचे कपट लक्षात आले. त्यांनी एकदा संधी साधून कच समिधा आणायला वनात गेलेला असताना त्याला गाठून ठार केले. बराच उशीर होऊनही कच घरी न परतल्याने देवयानी अस्वस्थ झाली आणि आपल्या वडिलांना म्हणाली, 'कच अजून कसा आला नाही?' ५३. शुक्राचार्यांनी ध्यानाने कचाची हत्या झाल्याचे जाणले आणि संजीवनी मंत्राच्या प्रभावाने त्याला जिवंत करून घरी परत आणले. देवयानीला त्यामुळे आनंद वाटला.५४. दैत्यांनी पुन्हा कचाला ठार करून त्याचे मांस हिंस्र पशूंना खाऊ घातले. कच न दिसल्यामुळे शोक करणाऱ्या आपल्या मुलीला आश्वासित करून(५५) शुक्राचार्यांनी त्याला श्वापदांनी खाल्ल्याचे जाणले. मग त्याला त्या श्वापदांच्या पोटांतून पूर्णपणे काढले आणि एकत्र जोडून पुन्हा पहिल्याप्रमाणे जिवंत केले.५६.

**पुनर्दैत्याः कचं हुत्वा तद्भस्म मधुयोजितम् । ददुः शुक्राय प्रमादात् स पपौ दैत्यवत्सलः ।।५७।।**
**पुनः कन्यातिखिन्नाऽभूच्छुक्रो ज्ञात्वोदरस्थितम् । दैत्यान्छशाप ब्रह्मघ्नान् कन्यामाह स नाप्यते ।।५८।।**
**दैत्यैः क्षिप्तः स मत्कुक्षौ तदानयनतो हि मे । मृत्युर्भवेन्न को वेद दिव्यं मन्त्रं हि मां विना ।।५९।।**
**कन्योचे तात मे मन्त्रमुपादिश च जीवय । तं त्वां यदेष्यति मृतिर्जीवयामि सुमन्त्रतः ।।६०।।**
**नोचेत्प्राणांस्त्यजामीति निर्विण्णास्यै स मोहतः । दत्वा मन्त्रं जपित्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ ।।६१।।**

पुनः दैत्याः कचं हुत्वा तत्+भस्म मधु+योजितं शुक्राय ददुः। दैत्यवत्सलः सः प्रमादात् पपौ।५७। पुनः कन्या अति+खिन्ना अभूत्। शुक्रः (तं) उदर+स्थितं ज्ञात्वा ब्रह्मघ्नान् दैत्यान् शशाप। कन्यां आह, 'सः न आप्यते।५८। दैत्यैः सः मत्+कुक्षौ क्षिप्तः। तत्+आनयतः हि मे मृत्युः भवेत्। दिव्यं मंत्रं हि मां विना कः न वेद।'५८-५९। कन्या ऊचे। '(हे) तात, मे मंत्रं उपादिश च तं जीवय। यत् त्वां मृतिः एष्यति (अहं) सुमंत्रतः जीवयामि।६०। नो चेत् प्राणान् त्यजामि।' इति निर्विण्णा। सः अस्यै मोहतः मन्त्रं दत्वा तं जीवयित्वा मृतिं ययौ।६१।

मग दैत्यांनी कचाला जाळून त्याचे भस्म केले आणि ते मधांत कालवून शुक्राला दिले. दैत्यांच्या वात्सल्याने शुक्राने फारशी चौकशी न करता ते पिऊनही टाकले.५७. त्या दिवशीसुद्धा कच आला नाही असे पाहून कन्या फारच खिन्न झाली. शुक्राचार्यांनी ध्यानाने पाहता तो आपल्याच पोटात असल्याचे त्यांना दिसून आले. तेव्हा दैत्यांनी केलेल्या ब्रह्महत्येने संतापून त्यांनी त्यांना शाप दिला आणि देवयानीला म्हणाले, 'तो आता कांही परत येणार नाही.५८. दैत्यांनी त्याला माझ्याच पोटात घातले आहे. त्याला आणले तर नक्कीच माझा मृत्यू होईल. आणि दिव्य संजीवनी मंत्र माझ्यावांचून कुणालाच येत नाही.'५९. देवयानी म्हणाली, 'बाबा! तो मंत्र मला शिकवा आणि कचाला जिवंत करा. तुम्हांला मृत्यू आल्यावर त्या संजीवनी मंत्राने मी तुम्हांला जिवंत करीन. अन्यथा मीच प्राणत्याग करीन!' असे कन्येचे निर्वाणीचे बोलणे ऐकून तिच्या ममतेने मोहित अशा शुक्राचार्यांनी मंत्राचा जप करून कचाला जिवंत केले आणि स्वतः मरण पावले.६०-६१.

**विदार्य जठरं प्राप्तं कचं दृष्ट्वा मृतं कविम् । मन्त्रेण जीवयामास तदाऽतेजाऽभवन्मनुः ।।६२।।**
**कृतकृत्यः कचो नत्वा गुरुं प्राह तदासुराः । घ्नन्ति मां तद्गृहं यास्ये मदर्थे भवतोऽप्यकम् ।।६३।।**
**सोऽपि गच्छेत्यादिदेश कन्योचे मत्पतिर्भव । मयैतदर्थमेव त्रिर्-जीवितोसि मृतोऽप्यहो ।।६४।।**
**कच ऊचे गुरोः कन्या स्वसाम्बास्वर्पणाच्च तत् । नोद्वाह्यातस्त्यजास्वर्ग्यं विरुद्धाग्रहमम्ब भोः ।।६५।।**
**सा विद्यां विस्मरेत्येनं शशापापि स तां नृपः । त्वां वरिष्यति मौर्ख्यात्ते नश्येन्मन्त्रो गुरोरिति ।।६६।।**

जठरं विदार्य प्राप्तं कचं दृष्ट्वा (देवयानि) मृतं कविं मन्त्रेण जीवयामास। तदा मनुः अतेजा अभवन्।६२। तदा कृतकृत्यः कचः गुरुं नत्वा प्राह। 'असुराः मां घ्नन्ति। तत् गृहं यास्ये। मत् अर्थे भवतः अपि अकम्।'६३। सः अपि 'गच्छ' इति आदिदेश। कन्या ऊचे, 'मत् पतिः भव। मया एतत् अर्थं एव त्रिः मृतः अपि जीवितः असि।'६४। कच ऊचे। 'गुरु+कन्या स्वसा। असु+अर्पणात् च अम्बा। तत् न उद्वाह्या। अतः भो अम्ब, अस्वर्ग्यं विरुद्ध+आग्रहं त्यज।'६५। सा एनं 'विद्या विस्मर' इति शशाप। सः तां, 'ते मौर्ख्यात् त्वां नृपः वरिष्यति। गुरोः मन्त्रः नश्येत्।' इति (शशाप)।६६।

आपल्या पित्याचे पोट फाडून कच बाहेर आलेला पाहताच देवयानीने मन्त्राने शुक्राचार्यांना जिवंत केले. मात्र त्यानंतर त्या मंत्राचे तेज लोप पावले.६२. तेव्हा आपला कार्यभाग साधलेला जाणून कचाने गुरू शुक्राचार्यांना वंदन केले आणि म्हणाला, 'हे दैत्य मला कांही जिवंत ठेवणार नाहीत. तेव्हा मी आपल्या घरी जातो. माझ्याकारणे आपल्यालाही खूप कष्ट झाले.'६३. शुक्राचार्यांनीही त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. तेव्हा देवयानी कचाला म्हणाली, 'तू माझा पती हो! याचसाठी तू मेलेला असताही तुला तीन वेळा मी जीवदान दिले.'६४. कच उत्तरला, 'तू गुरूंची कन्या असल्याने माझी बहीण लागतेस. मला जीवदान दिल्याने आता तू माझी माताच आहेस. तेव्हा आपला विवाह होऊ शकत नाही. तरी माते, हा अधःपातकारी शास्त्रविरुद्ध हट्ट तू सोड.'६५. तेव्हां तिने त्याला 'तू तुझी विद्या विसरशील!' असा शाप दिला. त्यानेही तिला उलट शाप दिला की, 'तुझ्या मूर्खपणाने तुझे लग्न राजाशी (क्षत्रियाशी) होईल आणि गुरुमहाराजांचा मंत्र नष्ट होईल.'६६.

**मन्त्रोऽतेजास्तदैवाभूच्छुक्रो दीनत्वमापतत् । स्त्रियै मन्त्रस्ततोऽदेयः कार्यं गुर्वाज्ञया व्रतम् ।।६७।।**

**।। सावित्र्युवाच ।।**

**भगवन्सद्गुरो मन्त्रो यर्ह्यग्राह्यो हि योषिताम् । तर्ह्येकं व्रतमाख्याहि तारकं ते स्मृतिप्रदम् ।।६८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सुलभं तारकं साध्वि सोमवारमहाव्रतम् । व्रतोत्तमं सुधामेष्ट-दं केऽप्यस्याधिकारिणः ।।६९।।**

'तदा एव मन्त्रः अतेजा अभूत्। शुक्रः दीनत्वं आपतत्। ततः स्त्रियै मन्त्रः अदेयः। गुरु+आज्ञया व्रतं कार्यम्।'६७। सावित्री उवाच। '(हे) सद्गुरु भगवन्, यर्हि योषितां मन्त्रः अग्राह्यः तर्हि एकं तारकं ते स्मृतिप्रदं व्रतं आख्याहि।'६८। श्रीगुरुः उवाच। '(हे) साध्वि, सोम+वार+महा+व्रतं व्रतोत्तमं सुलभं तारकं सुधाम+इष्टदम्। सर्वे अपि अस्य अधिकारिणः।६९।

**स्त्रियांना मंत्राचा अधिकार आहे का?** तत्काळ तो संजीवनी मंत्र निस्तेज झाला आणि शुक्राचार्यांना दीनत्व आले. एवढ्यासाठी स्त्रियांना मंत्र देऊ नये. पूर्वीच्या युगात गोधा, घोषा, विश्ववारा इत्यादि ब्रह्मज्ञानी स्त्रियांचा उल्लेख आहे. *घोषा गोधा विश्ववारा, अपालोपनिषन्निषत्। ब्रह्मजाया जहुर्नाम अगस्त्यस्य स्वसा दिती।।८४।। इन्द्राणी चेन्द्रमाता च सरमा रोमशोर्वशी। लोपामुद्रा च नद्यश्च यमो नारी च शाश्वती।।८५।। श्रीर्लक्ष्मी सर्पराज्ञा वाक्श्रद्धा मेधा च दक्षिणा। रात्रि सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरितः।।८६।।* (बृहत् देवता अ. २४) तथापि सांप्रत कलियुगात स्त्रियांना मंत्राचा अधिकार नाही हा विशेष आहे. यावर असा आक्षेप घेता येईल की, गीतेत (९:३२) स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हेसुद्धा परम गती पावतात असे म्हटले आहे. मंत्राचा जर त्यांना अधिकार नसेल तर त्यांना मोक्ष कसा मिळेल? याचे समाधान श्लोकाच्या अंतिम चरणांत दिले आहे. त्यांनी व्रत करावे; पण तेही गुरूंच्या आज्ञेने, आपल्या स्वतंत्र बुद्धीने नाही. वितानकर्मांत (वितान=अथर्ववेदाचे परिशिष्ट) मात्र स्त्रियांना मंत्रपाठाचा आणि श्रवणाचा अधिकार आहे.६७.

**सीमन्तिन्या यत्प्रभावान् नष्टोऽप्याप्तः पतिः शृणु । प्राक् चित्रवर्मार्यावर्ते राजा शूरो वशी कृती ।।७०।।**
**धीरूपशीललक्ष्माढ्यां पुत्रीं लेभेऽजसेवया । शान्त्याद्याढ्या सती भर्त्रायुताब्दं राज्यभोक्त्र्यसौ ।।७१।।**
**इत्यूचुर्गणकास्त्वेको बाल्ये वैधव्यमित्यपि । राजा हृष्टोऽपि खिन्नोऽभूद् ववृधे सा सितेन्दुवत् ।।७२।।**

यत् प्रभावात् सीमन्तिन्या नष्टः अपि पतिः आप्तः (तत्) शृणु। प्राक् आर्यावर्ते चित्रवर्मा वशी कृती राजा (अभूत्)।७०। (सः) अज+सेवया धी+रूप+शील+लक्ष्म+आढ्यां पुत्रीं लेभे। गणकाः, असौ शान्ति+आदि+आढ्या सती भर्त्रा अयुत अब्दं राज्य+भोक्त्री इति ऊचुः। एको, 'बाल्ये वैधव्यं' इति अपि। राजा हृष्टः अपि खिन्नः अभूत्। सा सित+इन्दु+वत् ववृधे।७१-७२।

त्यावर सावित्रीने प्रार्थना केली, 'अहो सद्गुरू भगवान, जर स्त्रियांना मंत्र घेता नाही तर मग आपण मला एक असे तारक व्रत सांगा ज्यायोगे मला आपले स्मरण राहील.' वरील गीताश्लोकांत स्त्रियादिकांना मोक्षासाठी आपला व्यपाश्रय (आधार) आवश्यक असल्याचे प्रतिपादन आहे. म्हणून ही सती गुरुस्मरणाची याचना विशेषत्वाने करीत आहे.६८. श्रीगुरू म्हणाले, 'हे सती, सोमवार हे महाव्रत सर्व व्रतांत उत्तम व्रत आहे. ते सुलभ, तारक, प्रभावी आणि इष्टकामना पुरविणारे आहे. हे व्रत कुणालाही - धर्मबाह्य यवनादिकांना सोडून, सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्रिया इत्यादींना करता येते. उमा म्हणजे अध्यात्मविद्या किंवा पार्वतीमाता, तिच्यासह असलेला सोम म्हणजे भगवान शंकर. त्यांचा वार म्हणजे आनंदवर्धक दिवस तो सोमवार. हे नित्यही करता येते किंवा काम्यही आहे त्यामुळे त्याला महाव्रत म्हटले आहे.६९. ज्या व्रताच्या प्रभावाने सीमन्तिनीला आपला मरण पावलेला पतीसुद्धा परत मिळाला त्याची कथा ऐक. पूर्वी आर्यावर्तात चित्रवर्मा सामर्थ्यशाली आणि प्रतापी राजा होता.७०. त्या राजाला भगवान शंकरांच्या उपासनेच्या फलस्वरूप एक मुलगी झाली. ती बुद्धिमान, रूपवान्, शीलवान आणि उत्तम लक्षणांनी युक्त अशी होती. तिच्या जन्माच्या वेळेनुसार ज्योतिष्यांनी भाकित वर्तविले की, 'ही कन्या शांती, दया, क्षमा आदि गुणांनी युक्त अशी सती असून आपल्या पतीसह दहा हजार वर्षे राज्य करील.' राजाला आनंद वाटला; पण तेवढ्यात एक ज्योतिषी असेही म्हणाला की, 'ही बालपणीच विधवा होईल.' राजाच्या आनंदावर विरजण पडल्यासारखे झाले. पुढे ती कन्या शुक्लपक्षाच्या चंद्रासारखी वाढू लागली.७१-७२.

**सा द्वादशाब्दिका श्रुत्वा वैधव्यं भावि दुःखिता । नत्वैकदाप्तां मैत्रेयीं साऽवैधव्यं स्म याचते ।।७३।।**
**तां साब्रवीत्सोमवार-व्रतात् त्रातास्ति शंकरः । प्रतीन्दुवारं संसेव्यो गोहृत्कायैः सदाशिवः ।।७४।।**
**उपोष्य नक्तं भुक्त्वा वा भक्त्यास्मिन्न क्षणं स्वपेत् । नश्येत्प्राप्तापि भीस्त्यक्ते व्रते कुप्येत शंकरः ।।७५।।**

सा द्वादश+अब्दिका भावि वैधव्यं श्रुत्वा दुःखिता। सा एकदा आप्तां मैत्रेयीं नत्वा अवैधव्यं याचते स्म।७३। सा तां अब्रवीत्। 'सोमवार+व्रतात् शंकरः त्राता अस्ति। प्रति इन्दुवारं गो+हृत्+कायैः सदाशिवः (सदा शिवः) उपोष्य, नक्तं भुक्त्वा वा भक्त्या संसेव्यः। अस्मिन् न क्षणं (अपि) स्वपेत्। प्राप्ता अपि भी नश्येत्। व्रते त्यक्ते शंकरः कुप्येत।७४-७५।

ती बारा वर्षांची असताना आपण विधवा होणार असल्याचे भविष्य तिच्या कानांवर पडले. त्यामुळे ती दुःखित झाली. एकदा घरी आलेल्या मैत्रेयीला शरण जाऊन तिने अवैधव्याची याचना केली. **'आप्तां'** या शब्दाचा अर्थ आलेल्या असाही होतो किंवा हितोपदेश करणारी ब्रह्मज्ञानी साध्वी असाही होतो.७३. मैत्रेयीने तिला सांगितले, 'सोमवार व्रत करणाऱ्याचे भगवान शंकर रक्षण करतात. दर सोमवारी इंद्रिये, मन आणि देह यांनी (कायावाचामने) उपास करून किंवा रात्री उपास सोडून भक्तिभावाने सदाशिवाची सेवा करावी. त्या दिवशी क्षणभरही झोपू नये. किंवा स्वयंप्रकाश अपरोक्षरूप शिवाच्या चिंतनात किंचितसुद्धा प्रमाद करू नये. अगदी समोर आलेले संकटही नाश पावते. एकदा घेतलेले व्रत टाकले तर मात्र शंकरांचा कोप होतो'. व्रताचे सातत्य टिकावे म्हणून हे शासन सांगितले आहे.७४-७५.

**पापक्षयोऽस्याभिषेकात् साम्राज्यं पीठपूजनात् । गन्धादिदानात्सौभाग्यं सौगन्ध्यं धूपदानतः ।।७६।।**
**दीपात्कान्तिर्भोज्यदानाद्भुक्तिस्ताम्बूलतो रमा । नत्या पुमर्था ऐश्वर्यं जपाद्ब्राह्मणभोजनात् ।।७७।।**
**सर्वतृप्तिः कोशवृद्धिर्होमाल्लभ्याखिलं स्तवात् । तद्व्रतं कुर्विति प्रोक्त्वा सागात्कन्याऽकरोद्व्रतम् ।।७८।।**
**भूयाद्भाव्येषा देयेति मत्वा चन्द्राङ्गदाय राट् । तां वरायानुरूपाय नलगोत्रभुवे ददौ ।।७९।।**
**गजाश्वदासराष्ट्रादि दत्वापि स्वपुरे मुदा । पुत्राभावात्स तं राजा मेने संस्थाप्य पुत्रवत् ।।८०।।**

अस्य अभिषेकात् पापक्षयः, पीठपूजनात् साम्राज्यं, गन्धादिदानात् सौभाग्यं, धूपदानात् सौगन्ध्यम्।७६। दीपात् कान्तिः, भोज्यदानात् भुक्तिः, ताम्बूलतो रमा, जपात् ऐश्वर्यं, ब्राह्मणभोजनात् सर्वतृप्तिः, होमात् कोशवृद्धिः, स्तवात् अखिलं लभ्य। तत् व्रतं कुरु इति प्रोक्त्वा सा अगात्। कन्या व्रतं अकरोत्।७७-७८। राट् 'भावि भूयात्, एषा देया' इति मत्वा तां अनुरूपाय वराय नल+गोत्र+भुवे चन्द्राङ्गदाय ददौ।७९। गज+अश्व+दास+राष्ट्र+आदि दत्वा अपि राजा पुत्र+अभावात् तं मुदा स्वपुरे संस्थाप्य पुत्रवत् मेने।८०।

आता सोमवारी केलेल्या शिवाच्या पूजनाची फळे सांगतात. शंकराला अभिषेक केल्याने पापक्षय होतो; पीठपूजनाने साम्राज्यप्राप्ती; सुगंधी पदार्थ अर्पण केल्याने सौभाग्य; धूप दिल्याने देह सुगंधी होतो; दीप दाखविल्याने शरीर तेजस्वी होते; नैवेद्य समर्पण केल्याने सर्व भोग मिळतात; विडा दिल्याने लक्ष्मीचा लाभ होतो; जपाने ऐश्वर्य येते; शिवप्रीत्यर्थ ब्राह्मण जेवू घातले तर सर्वांची तृप्ती; आणि होम केल्याने सर्व कांही प्राप्त होते. 'तरी तू हे व्रत कर.' असे सांगून मैत्रेयी निघून गेली. सीमन्तिनीने तिच्या उपदेशानुसार सोमवार व्रत सुरू केले.७६-७८.

यथाकाल आपली कन्या उपवर झालेली पाहून, 'जे होणार ते चुकेना' अशा विचाराने राजाने तिचा विवाह तिला अनुरूप अशा नलराजाच्या गोत्रातील चंद्रांगद नावाच्या वराशी केला.७९. राजाने जावयाला हत्ती, घोडे, दास-दासी, राज्य इत्यादि आंदण तर दिलेच. पण राजाला पुत्र नसल्याने त्याने चंद्रांगदालाच आपला पुत्रच मानून आपल्याच नगरीत ठेवून घेतले.८०.

**कालिन्द्यामेकदा क्रीडन्मज्जति स्म स तच्चराः । पितरौ श्वशुरौ गत्वा तदूचुस्तत एत्य ते ।।८१।।**
**अन्वेष्यापि न तं प्रापुः शोकं चक्रुस्तदाखिलाः । कन्यानुगन्तुमुत्कापि शवाभावान्निवारिता ।।८२।।**
**तामाश्वास्यानयद्राष्ट्रं चित्रवर्मा नृपः सुता । शोकार्ताप्यकरोत्प्रेम्णा सोमवारव्रतं शुभम् ।।८३।।**
**पुत्रशोकाकुलं त्विन्द्र-सेनं सस्त्रीकमुत्तमम् । खिन्नं संस्थाप्य कारायां तद्राज्यं बुभुजेऽहितः ।।८४।।**
**तं नागिन्योऽम्बुमग्नं स्वं लोकं नीत्वामृतोपमम् । सर्पेशाय ददुः सर्पेट् सुधया तं व्यजीवयत् ।।८५।।**

एकदां कालिन्द्यां क्रीडन् सः मज्जति स्म। तत्+चराः पितरौ श्वशुरौ गत्वा तत् ऊचुः। ततः ते एत्य अन्वेष्य अपि तं न प्रापुः। तदा अखिलाः शोकं चक्रुः। कन्या अनुगन्तुं उत्का अपि शव+अभावात् निवारिता।८१-८२। चित्रवर्मा नृपः तां आश्वास्य राष्ट्रं आनयत्। सुता शोक+आर्ता अपि शुभं सोमवारव्रतं प्रेम्णा अकरोत्।८३। पुत्र+शोक+आकुलं खिन्नं इन्द्रसेनं तु अहितः सस्त्रीकं कारायां संस्थाप्य तत्+राज्यं बुभुजे।८४। अम्बु+मग्नं तं नागिन्यः स्वं अमृत+उपमं लोकं नीत्वा सर्पेशाय ददुः। सर्पेट् तं सुधया व्यजीवयत्।८५।

एकदा तो चंद्रांगद यमुना नदीत जलक्रीडा करीत असता बुडाला. त्याच्या सहचरांनी ते वृत्त त्याच्या मातापित्यांना आणि सासूसासऱ्यांना जाऊन सांगितले. सगळ्यांनी तिथे येऊन नदीत त्याला खूप शोधले. पण तो कांही सापडला नाही. सगळे शोक करू लागले. सीमन्तिनी सहगमन करण्यास उत्सुक होती. पण प्रेत जवळ नसल्याने तिला सगळ्यांनी परावृत्त केले.८१-८२. तिची समजून घालून चित्रवर्मा राजाने आपल्या घरी आणले. शोकग्रस्त असूनही सीमन्तिनीने मंगलदायक सोमवारव्रत प्रीतीपूर्वक चालूच ठेवले.८३. पुत्राच्या शोकाने व्याकुळ आणि खिन्न झालेल्या इन्द्रसेन राजाला त्याच्या शत्रूंनी पत्नीसह कारागृहात टाकले आणि त्याचे राज्य बळकावून घेतले.८४. इकडे पाण्यात बुडालेल्या चंद्रांगदाला नागस्त्रियांनी पाहिला. त्यांनी त्याला पाताळात नेले आणि आपला राजा वासुकी याच्या ताब्यात दिले. नागराजाने त्याला अमृत पाजून जिवंत केले.८५.

**अलौकिकं पुरं नागान्दृष्ट्वा स चकितोऽभवत् । वासुकिः प्राह तं कस्त्वं कस्य भक्तोऽसि मे वद ॥८६॥**

**॥ चन्द्राङ्गद उवाच ॥**

**सच्छ्लोकनलवंशोत्थ इन्द्रसेनसुतोऽस्म्यहम् । चन्द्राङ्गदाभिधो राजा जामाता चित्रवर्मणः ॥८७॥**

**कालिन्द्यां पतितस्त्वत्र केनानीतो न वेद्मि तत् । दैवाद्वो दर्शनं जातं सफलं जन्म कर्म मे ॥८८॥**

सः अलौकिकं पुरं, नागान् दृष्ट्वा चकितः अभवत्। वासुकिः तं प्राह। 'त्वं कः? कस्य भक्तः असि? मे वद।'८६। चन्द्रांगद उवाच। 'अहं सत्+श्लोक+नल+वंश+उत्थ इन्द्रसेन+सुतः चन्द्रांगद+अभिधः राजा चित्रवर्मणः जामाता अस्मि।८७। (अहं) कालिन्द्यां पतितः। अत्र तु केन आनीतः तत् न वेद्मि। दैवात् वः दर्शनं जातम्। मे जन्म कर्म सफलम्।'८८।

ते पाताललोकातील अलौकिक नगर आणि तिथले सर्व नाग पाहून तो चंद्रांगद विस्मित झाला. वासुकीने त्याला विचारले, 'तूं कोण आहेस? आणि कुणाचा भक्त आहेस? मला सांग.' इथे अशी एक शंका उपस्थित होऊ शकते की कर्मकांडात हे व्रत आणि उपासना यांचा समावेश असंगत आहे. पण देवताज्ञानपूर्वक कर्म हे श्रेष्ठ मानलेले आहे. व्रताच्या निमित्ताने देवताज्ञानासहित (विद्या) कर्माचे (अविद्या) अनुष्ठान (*विद्यांचाविद्यां च*) श्रुतीच्या प्रतिपादनाला धरून आहे (ईश उ. ९:१२).८६. चंद्रांगद म्हणाला, 'मी पुण्यश्लोक नल राजाच्या वंशांत जन्मलेला इन्द्रसेन राजाचा पुत्र आहे; माझे नाव चंद्रांगद असून मी चित्रवर्मा राजाचा जावई आहे.'८७. 'कालिंदी नदीत मी बुडाल्याचे स्मरते; पण मला इथे कुणी आणले ते माहीत नाही. माझ्या सद्भाग्याने आपले दर्शन झाले. हे माझ्या जन्माचे सार्थकच झाले!'८८.

**सृष्ट्यादिहेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयोऽप्यजः । कैलासे मूर्तिमद्योऽस्ति शम्भुर्नः कुलदैवतम् ।।८९।।**

**।। वासुकिरुवाच ।।**

**पूतोऽस्यत्र पुरे तिष्ठ भुञ्जन्भोगानमानुषान् । सुधाकल्पद्रुपूर्णे रुक्-शुग्भीनिद्रालयोनिते ।।९०।।**

**।। चन्द्राङ्गद उवाच ।।**

**मां तु मत्वा मृतं नद्यां पितरौ मे मरिष्यतः । शोकार्तापि वधूर्वर्षे वर्तमाने विवाहिता ।।९१।।**

'सृष्टि+आदि+हेतुः सर्वेशः सर्वात्मा चिन्मयः अजः यो कैलासे मूर्तिमत् अस्ति (सः) शंभुः नः कुलदैवतम्।'८९। वासुकिः उवाच। 'पूतः असि! अत्र सुधा+कल्प+द्रु+पूर्णे शुक्+भी+निद्रा+लय+ऊनिते पुरे अमानुषान् भोगान् भुञ्जन् तिष्ठ।'९०। चन्द्राङ्गद उवाच। 'मे पितरौ मां तु नद्यां मृतं मत्वा मरिष्यति। शोकार्ता वधूः अपि वर्तमाने वर्षे विवाहिता।'९१।

मग चंद्रांगद आपण कुणाचे भक्त ते सांगत आहे. त्यातून त्याची आध्यात्मिक प्रगल्भता दृग्गोचर होते. तो म्हणतो, 'जगताच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचे कारण असणारा, मायेचाही नियंता, सर्व जीवमात्रांच्या अंतरांत राहून त्यांचे नियंत्रण करणारा, जीवापासून अभिन्न असा साक्षी, चैतन्यरूप आणि निर्विकार भगवान शिव, जो कैलासावर मूर्तरूपाने राहतो तोच आमचे कुलदैवत आहे. यावरून मूर्तिमंत शंकर मानवांना दृग्गोचर नसले तरी त्यांची उपासना परंपरेने आमच्या कुलांत चालत आलेली आहे असे सांगितले आहे. 'जो ज्याची उपासना करतो तो त्याच्यासारखाच होतो', या मुद्गल उपनिषदाच्या (३ः३) वचनानुसार चंद्रांगद हा शिवसायुज्याचा अधिकारी ठरतो.८९. वासुकी हे ऐकून प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'तू पावन आहेस. इथे पाताललोकातच राहून अलौकिक भोगांचा भोग घे. इथे अमृताचे साठे आहेत, कल्पवृक्षाच्या बागा आहेत. शोक, भय, निद्रा आणि मृत्यू यांची इथे वार्ताही नाही.'९०. चंद्रांगद उत्तरला, 'माझे मातापिता मी नदीत बुडून मेलो असे समजून प्राण देतील. माझे या वर्षीच लग्न झाले आहे. माझी शोकाकुल पत्नीसुद्धा माझ्याविना जगू शकणार नाही.'९१.

**श्रुत्वेति चेद्व्रजेत्युक्त्वा रत्नभूषामृतादिकम् । दत्वाऽह्यश्वौ मनोवेगौ गमयामास तौ स तु ।।९२।।**
**स ससर्पोऽश्वमारुह्य गच्छन् प्रेक्ष्य मनोजवः । कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं जगौ ।।९३।।**
**वधूः कस्यासि कन्या त्वं शोकार्तासि कुतोऽङ्गने । सा तच्छ्रुत्वा सखीं प्राह कथयास्मै सविस्तरम् ।।९४।।**

**।। सख्युवाच ।।**

**चन्द्राङ्गदवधूश्चित्र-वर्मकन्येयमत्र तु । प्रियो नष्टस्तच्छुगार्ता स्नात्यत्राद्यास्ति सद्व्रतम् ।।९५।।**

(वासुकिः) इति श्रुत्वा 'व्रज' इति उक्त्वा मनो+वेगौ अहि+अश्वौ, रत्न+भूषा+अमृतादिकं दत्वा तौ गमयामास।९२। सः ससर्पः अश्वं आरुह्य मनोजवः कालिन्द्यां सोमवारे स्वां विरूपां महिषीं प्रेक्ष्य जगौ।९२। '(हे) अङ्गने, त्वं कस्य वधूः, कन्या असि? कुतः शोक+आर्ता असि?' सा तत् श्रुत्वा सखीं प्राह, 'अस्मै सविस्तरं कथय।'९३। सखी उवाच। 'इयं चन्द्राङ्गद+वधूः चित्रवर्म+कन्या। अत्र तु प्रियः नष्टः। तत्+शुक्+आर्ता। अद्य सत्+व्रतं अस्ति। (अतः) अत्र स्नाति।९५।

हे ऐकून वासुकी म्हणाला, 'मग तुला जायला पाहिजे.' त्याने त्याच्या साह्याकरता एक सर्प आणि मनासारखा वेगवान घोडा दिला. शिवाय दिव्य रत्ने, भूषणे, अमृत इत्यादि भेटीही दिल्या आणि त्या दोघांना निरोप दिला.९२. त्या नागाला बरोबर घेऊन घोड्यावर बसून तो चंद्रांगद मनोवेगाने कालिंदी नदीच्या तीरावर पोचला. त्या दिवशी नेमका सोमवारच असल्याने व्रताच्या अनुष्ठानासाठी सीमन्तिनीही तिथे आली होती. तिला सौभाग्यालंकारविरहित विधवेच्या वेषात पाहून तो खिन्न झाला. त्याने तिला विचारले.९३. 'बाईसाहेब, आपले पती कोण आहेत. पिता कोण आहेत? आणि आपण इतक्या दुःखीकष्टी का आहात?' त्यावर तिने आपल्या सहचरींना त्याला सर्व सविस्तर सांगायला सांगितले.९४. तिच्या सख्यांनी त्याला सांगितले, 'ही चंद्रांगदाची पत्नी आणि चित्रवर्म्याची कन्या आहे. इथेच ह्या नदीत तिचा पती बुडून मरण पावला. त्यामुळे ती शोकपीडित आहे. आज सोमवारचे व्रत असल्याने ही इथे स्नानासाठी आली आहे.९५.

**कारायां श्वशुरावस्याः संस्थाप्य बुभुजे स्वयम् । राज्यं रिपुः सोमवार-व्रतमेषा करोत्यतः ।९६।।**
**सीमन्तिन्यपि तद्रूपं दृष्ट्वा स्वपतिसन्निभः । कोऽयं धूर्तोऽसि यक्षो वा भाति वा स्वप्नहृद्भ्रमः ।।९७।।**
**इति मत्वा शुशोचैनामाश्वास्याहैष्यति त्र्यहात् । पुण्याद्भर्ता तवेत्युक्त्वा राष्ट्रं चन्द्राङ्गदो ययौ ।।९८।।**
**सापि तूष्णीं ययौ राष्ट्रं पितुश्चन्द्राङ्गदस्त्वरिम् । स्वागमं श्रावयामास स भीतो मुक्तवान्नृपम् ।।९९।।**
**द्विषा क्षमापितो मुक्तश् चन्द्रसेनः समागतम् । श्रुत्वा नष्टं सुतं वध्वा प्रेमाश्रूत्तोऽभवत्क्षणात् ।।१००।।**

अस्याः श्वशुरौ कारायां संस्थाप्य रिपुः स्वयं राज्यं बुभुजे। अतः एषा सोमवारव्रतं करोति।'९६। सीमंतिनी अपि तत्+रूपं दृष्ट्वा 'स्व+पति+सन्निभः कः अयं? धूर्तः अस्ति? यक्षः वा? स्वप्न+हृत्+भ्रमः वा भाति?'९७। इति मत्वा शुशोच। एनां आश्वास्य चन्द्राङ्गदः आह। 'तव पुण्यात् तव भर्ता त्रि+अहात् एति।' इति उक्त्वा (सः) राष्ट्रं ययौ।९८। सा अपि तूष्णीं पितुः राष्ट्रं ययौ। चन्द्राङ्गदः अरिं स्व+आगमं श्रावयामास। स भीतः नृपं मुक्तवान्। द्विषा क्षमापितः मुक्तः चन्द्रसेनः समागतं श्रुत्वा (नृपः) वध्वा प्रेम+अश्रूत्तः अभवत्।९९।

हिच्या सासूसासऱ्यांना बंदीशाळेत टाकून शत्रूंनी त्यांचे राज्य बळकावले आहे. तरी ही सोमवार व्रत करीत असते.'९६. त्या वेळी सीमंतिनीने त्याचे रूप निरखून पाहिले तेव्हां, 'हा आपल्या पतीसारखाच दिसतो आहे. कोण असेल हा? कुणी तोतया किंवा यक्ष असेल का? की माझ्या मनाचा हा खेळ नसेल ना? की हे स्वप्नच आहे?'९७. अशा विचारांनी कासावीस होऊन ती रडू लागली. चंद्रांगदाने तिचे सांत्वन केले. म्हणाला, 'शोक करू नकोस. तुझ्या पुण्याईने तुझा पती तीन दिवसात परत येईल.' असे बोलून तो आपल्या राज्याकडे निघून गेला.९८. तीसुद्धा आपल्या पित्याच्या नगरीला परतली. पण ही हकीकत तिने कुणालाही सांगितली नाही. चंद्रांगदाने आपले राज्य बळकावलेल्या शत्रूंना आपल्या आगमनाची सूचना दिली. त्यांनी घाबरून इंद्रसेन राजाला कारागृहातून सोडले(९९) आणि त्याची क्षमा मागितली. राजा आणि राणी चंद्रांगदाच्या आगमनाची वार्ता ऐकून आनंदाने गहिवरले.१००.

**अलङ्कृतं पुरं सोऽपि प्रविश्य पितरौ दृढम् । समालिङ्ग्यादितः सर्वं शशंस पुलकाङ्कितः ।।१०१।।**
**सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्पित्रनुज्ञया । गत्वा श्वशुरराष्ट्रं स्व-भार्याशोकं जहार सः ।।१०२।।**
**आनीतानर्घवस्तूनि तस्यै दत्वा तया सह । राज्यमेत्याभिषिक्तः स जिष्णुवद्बुभुजे श्रियम् ।।१०३।।**
**इयान् व्रतप्रभावस्तद्-व्रतं कुर्वित्यजोऽब्रवीत् । ततः प्रभृत्युभौ भक्त्या चेरतुर्व्रतमुत्तमम् ।।१०४।।**
**गुर्वाज्ञयेयितुर्गेहं प्रत्यब्दं गुरुदर्शनम्। कृत्वा श्रीपुत्रपौत्राढ्यावुभयीं सिद्धिमापतुः ।।१०५।।**

सः अपि अलङ्कृतम् पुरं प्रविश्य पितरौ दृढं समालिङ्ग्य पुलकाङ्कितः सर्वं आदितः शशंस।१०१। सर्पं सत्कृत्य राज्याय प्रेरयत्। पितृ+अनुज्ञया श्वशुर+राष्ट्रं गत्वा सः भार्या+शोकं जहार।१०२। आनीत+अनर्घ+वस्तूनि तस्यै दत्वा तया सह राज्यं एत्य अभिषिक्तः सः जिष्णुवत् श्रियं बुभुजे।१०३। इयान् व्रत+प्रभावः। 'तत् व्रतं कुरु।' इति अजः अब्रवीत्। ततः प्रभृति उभौ उत्तमं व्रतं भक्त्या चेरतुः।१०४। गुरु+आज्ञया गेहं ईयतुः। प्रति अब्दं गुरु+दर्शनं कृत्वा उभयीं सिद्धिं आपतुः।१०५।

चंद्रांगदही सजविलेल्या नगरात प्रवेश करून मातापित्यांना कडकडून भेटला. प्रेमभराने त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्याने त्यांना सर्व हकीकत सविस्तर निवेदन केली.१०१. आपल्यासोबत आलेल्या सर्पाचा सत्कार करून त्याला त्याच्या राज्याला - पाताळाला बोळविले. नंतर आपल्या वडिलांची अनुज्ञा घेऊन सासऱ्याच्या राज्याला जाऊन त्याने आपल्या पत्नीचे दुःख निवारण केले.१०२. पाताळातून आणलेल्या मौल्यवान वस्तू तिला देऊन तिला प्रसन्न केले. नंतर तिला घेऊन तो आपल्या नगरीला परतला. तिथे इंद्रसेनाने त्याला राज्याभिषेक केला. अशा रीतीने त्याने सीमन्तिनीसह इंद्राप्रमाणे ऐश्वर्य भोगले.१०३. ही कथा सांगून श्रीगुरू सावित्रीला म्हणाले, 'असा हा सोमवारव्रताचा प्रभाव आहे. तरी तू हे व्रत कर!' तेव्हापासून ती दोघे दंपती त्या उत्तम व्रताचे आचरण करू लागले.१०४. नंतर श्रीगुरूंची आज्ञा घेऊन ते आपल्या घरी माहुरला गेले. दर वर्षी त्यांचा श्रीगुरूंच्या दर्शनाला येण्याचा नियम होता. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही सिद्धी त्यांना लाभल्या.१०५.

**एवं जगन्मङ्गलमङ्गलात्मा मनुष्यभावात्परिगृह्य भक्तान् ।**
**सञ्चारपूतां जगतीं विधाय ततान लीलाममलामघघ्नीम् ।।१०६।।**

**इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे दम्पतीगुरुसंवादो नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः सप्तदशोऽध्यायः ।।१७।।**

**सप्ताहपारायणे चतुर्थः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम्। द्वितीयदिने आरम्भे श्रीगुरुस्तुतिः।**

एवं जगत्+मङ्गल+मङ्गल+आत्मा मनुष्य+भावात् जगतीं सञ्चार+पूतां विधाय अमलां अघघ्नीं लीलां ततान।१०६।

अशा प्रकारे जगाला सुखवणाऱ्या आनंदस्वरूप परमात्म्याने मनुष्यरूपाने भक्तांचा उद्धार करीत संचार करून ह्या भूतलाला पावन केले आणि आपल्या सर्व पावक आणि पापहारी लीलांचा विस्तार केला.

**समारोप -** सुवासिनींना पातिव्रत्यधर्मानेच ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधते, दुसरा कोणताही धर्म नाही; तसेच पतीच्या मृत्यूनंतर सहगमन हाच स्त्रीचा मुख्य धर्म आहे. ते शक्य नसेल तर तिने वैधव्यधर्माचे पालन करावे. तसे केल्याने निपुत्रिक स्त्रीलासुद्धा ब्रह्मचाऱ्यासारखी स्वर्गप्राप्ती होते. हे सर्व प्रतिपादन मागच्या (सोळाव्या) अध्यायात केले या अध्यायात संवादरूपाने स्त्रियांना मंत्राचा अधिकार नसला तरी व्रताच्या आचरणाने उभयतः कल्याण होते असे सांगून **स्त्रियांना मोक्षप्राप्तीमध्ये स्वातंत्र्य** आहे असे स्पष्ट केले आहे.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामिविरचित श्रीगुरुचरिताचा कर्मयोगांतला चौथा आणि प्रथमपासून सतरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अष्टादशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**निद्रितं मोहतम्यां मे मनोऽहङ्कारघूर्णितम् । बोधार्कोदयबुद्धं तत् पातुमैच्छत्कथामृतम् ।।१।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**वत्स विष्णौ प्रबुद्धोऽसि यत्तृप्तिः शृण्वतोऽपि नो । मन्ये त्वयि प्रसादोऽस्ति श्रीमद्भगवतो हरेः ।।२।।**
**शृण्वेको ब्राह्मणस्तत्र त्यक्तान्यान्नप्रतिग्रहः । दैवाप्तभुगृती शान्तोऽसक्तः कर्मपरो गृही ।।३।।**

नामधारक उवाच। मोह+तम्यां निद्रितं अहङ्कार+घूर्णितं मे मनः बोध+अर्क+उदय+बुद्धं तत् कथा+अमृतं पातुं ऐच्छत्।१। सिद्ध उवाच। (हे) वत्स विष्णौ प्रबुद्धः असि यत् शृण्वतः अपि नो तृप्तिः। श्रीमत्+भगवतः हरेः त्वयि प्रसादः अस्ति (इति) मन्ये।२। शृणु। तत्र एकः त्यक्त+अन्न+प्रतिग्रहः दैव+आप्त+भुक् ऋती शान्तः असक्तः कर्मपरः गृही ब्राह्मणः (अभूत्)।३।

श्रीगणेशाय नमः। अथाऽष्टादशोध्यायः। *ब्राह्मणीचा स्वभाव सुधारुनि अठराव्यांत। सांगती अखिल कर्मकांड श्रीगुरुनाथ।।१।।* नामधारक म्हणाले, 'मोहरूपी रात्रीत झोपलेले - आत्मस्वरूपाला विसरलेले, माझे मन आपल्या बोधरूपी सूर्याच्या उदयाने जागे झाले आहे. भानावर आले आहे. त्यामुळे मी श्रीगुरूंच्या लीलारूपी अमृताच्या पानाला उत्सुक झाले आहे.'१. सिद्ध म्हणतात, 'बेटा! ज्या अर्थी इतका वेळ श्रवण करूनही तुला तृप्ती न वाटता अधिकच ऐकण्याची इच्छा होते आहे त्या अर्थी तू खरेच व्यापक श्रीगुरूंच्या विषयी जाग्रत झाला आहेस. तुझ्यावर त्या हरीचा, भगवंताचा कृपाप्रसाद झाला आहे असे मला वाटते.'२. ऐक तर! तिथे गाणगापुरात परान्नाचा त्याग केलेला, दैवाने मिळेल तेच संतोषाने सेवन करणारा, सत्यवचनी, शांत, कर्मनिष्ठ पण अनासक्त वृत्तीचा एक गृहस्थ ब्राह्मण राहत होता.३.

**तत्स्त्रीः कृत्येव सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वान्यसद्मनि । लभन्ते स्वंशुकार्थांस्तद् दृष्ट्वा पतिमगर्हयत् ।।४।।**
**भोक्तुं भर्त्रा सहाहूता धनिनैकेन सैकदा । पत्याऽक्रुट्कामलोभेन निषिद्धैत्यावदद्गुरुम् ।।५।।**
**दीनां कुचैलां क्षुधितां पत्या साकं धनी गृहे । दाताह्वयति भोक्तुं मां पतिं बोधय नैति सः ।।६।।**
**तच्छ्रुत्वाहूय तं गच्छ भोक्तुं वध्वेत्यजोऽब्रवीत् । स प्राह नियमं हित्वा तथा कुर्वे त्वदाज्ञया ।।७।।**

तत्+स्त्रीः कृत्या इव। अन्य+सद्मनि सस्त्रीकाः स्वादु भुक्त्वा सु+अंशुकाः अर्थान् (च) लभन्ते। तत् दृष्ट्वा पतिं अगर्हयत्।४। सा एकदा भर्त्रा सह भोक्तुं आहूता। अ+क्रुट्+काम+लोभेन पत्या निषिद्धा। (सा) गुरुं एत्य अवदत्।५। दीनां कुचैलां क्षुधितां मां धनी दाता पत्या साकं गृहे आह्वयति। सः न एति। पतिं बोधय।६। तत् श्रुत्वा अजः तं आहूय अब्रवीत् वध्वा भोक्तुं गच्छ। सः प्राह, नियमं हित्वा त्वत्+आज्ञया तथा कुर्वे। ७।

त्याची पत्नी मात्र कर्कशा आणि दुष्ट स्वभावाची होती. गाणगापूरला येणाऱ्या श्रीमंत लोकांकडे जाऊन सगळे गोडधोड खातात; शिवाय त्यांना चांगलीचुंगली वस्त्रे आणि दक्षिणाही मिळते हे पाहून तिला कुणाचेही निमंत्रण न स्वीकारणाऱ्या आपल्या नवऱ्याचा तिरस्कार वाटत असे.४. तिला एकदा एका धनवंताने पतीसह भोजनाचे आमंत्रण दिले. तिच्या क्रोध-काम-लोभरहित पतीने तिला जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हा ती श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना नवऱ्याचे गाऱ्हाणे सांगूं लागली.५.

'पहा ना गुरुमहाराज! आम्ही कायमचेच दरिद्री आहोत. ना पोटभर अन्न ना अंगभर वस्त्र कधी असते! आज एका दानशूर श्रीमंताने त्याच्या घरी आम्हाला दोघांना जेवायला बोलावले आहे. पण हे कांही ऐकायलाच तयार नाहीत. तुम्हीच त्यांना सांगा. कधी तरी पोटभर गोडधोड खायला मिळेल!'६. तिचे ते बोलणे ऐकून श्रीगुरूंनी तिच्या पतीला बोलावून घेतले आणि त्याला आपल्या पत्नीसह भोजनाला जायला सांगितले. तो म्हणाला, 'मी माझा नियम मोडूनसुद्धा आपल्या आज्ञेचे पालन करीन.'७.

इत्युक्त्वागात्तया भोक्तुं श्वक्रोडोच्छिष्टपाकतः । भुञ्जन्ती ददतेऽन्नं सा दृष्ट्वा पत्ये शशंस तत् ।।८।।
उत्थायोभौ ततः खिन्नौ गुरुं प्राप्य तदूचतुः । स प्राहाङ्गाद्य लब्धं ते स्त्रीः परान्नसुखं परम् ।।९।।
सोचेऽद्य च्छलितो भर्ता क्षन्तव्यो मन्तुरद्य मे । तामाह श्रीगुरुरितः पत्यनुज्ञानुगा भव ।।१०।।

।। विप्र उवाच ।।

निष्ठाऽन्यथा कृता मेऽद्य दुष्टयाघं कथं व्रजेत् । जन्मप्रभृत्यद्य यावन् नेदृक्पापं मया कृतम् ।।११।।

इति उक्त्वा तया भोक्तुं अगात्। भुञ्जन्ती सा श्व+क्रोड+उच्छिष्ट+पाकतः अन्नं ददते (इति) दृष्ट्वा तत् पत्ये शंशस।८। ततः उभौ खिन्नौ उत्थाय गुरुं प्राप्य तत् ऊचतुः। सः प्राह। (हे) अङ्ग स्त्रीः अद्य ते परं परान्न+सुखं लब्धं (किम्)?९। सा ऊचे। 'अद्य (मया) भर्ता छलितः। मे मन्तुः क्षन्तव्यः।' श्रीगुरुः तां आह। 'इतः पति+अनुज्ञा+अनुगा भव।'१०। विप्र उवाच। 'अद्य दुष्टया मे निष्ठा अन्यथा कृता। अघं कथं व्रजेत्? जन्म+प्रभृति अद्य यावत् ईदृक् पापं मया न कृतम्।'११।

असे बोलून तो ब्राह्मण आपल्या स्त्रियेसह जेवायला गेला. तिथे जेवताना तिला दिसले की कुत्र्यांनी आणि डुकरांनी उष्टावलेले अन्नच वाढण्यात येत आहे. तिने ते आपल्या पतीला सांगितले.८. तेव्हा ते दोघेही जेवण टाकून उठले आणि श्रीगुरूंच्याकडे जाऊन त्यांना ते सर्व वृत्त सांगितले. ते म्हणाले, 'बाई गं! तुला आज परान्नभोजनाचे परमसुख मिळाले ना?'९. ती म्हणाली 'आज मी खरोखर पतीचा छळ केला. माझ्या ह्या अपराधाची क्षमा असावी.' त्यावर श्रीगुरू तिला म्हणाले 'इथून पुढे तू पतीच्या आज्ञेत राहा.'१०.

तो ब्राह्मण म्हणाला, या दुष्ट स्त्रीने माझ्या नियमाचा भंग करविला. आता हे पाप कसे जाईल? मी जन्मापासून आजपावेतो असे पाप केले नव्हते.११.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीस्त्वय्येष दोषो न दुश्चित्तं न कुलस्त्रियः । कार्यं सातः परं नेच्छेत् तथात्तुं क्वापि नैह्यतः ।।१२।।**
**कदाचिद्यस्य कस्यापि कर्माभाव उपस्थिते । द्विजाभावात्तु भोक्तव्यं तत्र दोषोऽन्यथा भवेत् ।।१३।।**

**।। विप्र उवाच ।।**

**परान्नं कस्य भोक्तव्यं कस्मिन्गेहे न कुत्र वा । कस्माद्दानं गृहीतव्यं निषिद्धं चापि शंस मे ।।१४।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**सद्विप्रवैदिकगुरुश्वशुरस्वशिष्य-मातामहालय उ भोजनतो न दोषः ।**
**नाऽचारहीनपरकर्मरताहितार्त-क्षुद्राशुचिस्वगुरुदुःखकरान्नमद्यात् ।।१५।।**

श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। एष त्वयि न दोषः। कुलस्त्रियः दुश्चित्तं न कार्यम्। सा अतः परं तथा न इच्छेत्। (त्वं) अतः (परं) क्व अपि अत्तुं न एहि।'१२। 'कदाचित् यस्य कस्य अपि द्विज+अभावात् कर्म+अभाव उपस्थिते तु भोक्तव्यम्। अन्यथा तत्र दोषः भवेत्।'१३। विप्र उवाच। परान्नं कस्य भोक्तव्यम्? कस्मिन् गेहे कुत्र वा न (भोक्तव्यम्)? कस्मात् दानं गृहीतव्यम्? (कस्मात्) निषिद्धम्? मे शंस।१४। श्रीगुरुः उवाच। 'सद्विप्र+वैदिक+गुरु+श्वशुर+स्व+शिष्य+मातामह+आलये भोजनतः न दोषः। आचारहीन+परकर्मरत+अहितार्त+क्षुद्र+स्व+गुरु+दुःख+कर+अन्नं न अद्यात्।'१५।

श्रीगुरू म्हणाले, 'हा दोष तुला लागणार नाही; कारण आपल्या धर्मपत्नीचे मन राखायला हवे. तीसुद्धा यापुढे तशी धर्मविरुद्ध इच्छा करणार नाही. तूसुद्धा यानंतर कुणाकडेही जेवायला जाऊ नकोस.१२. मात्र याला अपवाद आहे. एखाद्याचे श्राद्धादि कर्म भोजनाला ब्राह्मण न मिळाल्याने जर अडले असेल तर मात्र तिथे जेवायला हवे. अन्यथा म्हणजे कर्मलोपावाचून इतर कारणाने - जिभेचे चोचले पुरविण्यासाठी जेवल्यास मात्र दोष आहे. किंवा तिथे कर्मलोप होत आहे हे जाणूनही दुराग्रहाने न जेवल्यासही दोष लागतो.'१४. ब्राह्मणाने विचारले की, गुरुमहाराज! कुणाकडचे परान्न पवित्र असते? कुणाकडे घ्यावे आणि कुणाकडे घेऊ नये? तसेच कुणाचे दान घ्यावे आणि कुणाचे निषिद्ध आहे? ते आपण मला सांगावे. श्रीगुरू म्हणाले, 'सदाचारी ब्राह्मण अध्यापक; अन्नदाता, भयहर्ता इत्यादि, गुरू; सासरा; बांधव;

**दातारमेति सततं सुकृतं तदन्न-भुक्त्यास्य भोक्तुरघमेति तथाप्यमन्त्रात् ।**
**हूत्याङ्घ्रिजस्य च तथा खलु मासपुण्यं दर्शे परान्नग्रहणादपयाति भोक्तुः ।।१६।।**
**कन्यालयेऽर्भजननोत्तरमन्नमद्याल् लक्ष्मीरपैति सततं परगेहवासात् ।**
**ग्राह्यं च दानमपि सज्जनतो ग्रहे सत् क्षेत्रादिके न न कुहाप्यतिनिन्द्यदानम् ।।१७।।**
**उत्तमं यज्ञशिष्टान्नं दीक्षितब्रह्मिणोरपि । स्वार्थं पक्तं क्वापि नाद्यादद्याद्यज्ञार्पितं शुभम् ।।१८।।**

सततं तत्+अन्न+भुक्त्या भोक्तुः सुकृतं दातारं एति। अस्य अघं (भोक्तुं) एति। अङ्घ्रिजस्य हूत्या तथा एव। दर्शे परान्न+ग्रहणात् भोक्तुः मास+पुण्यं अपयाति।१६। कन्या+आलये अर्भ+जनन+उत्तरं अद्यात्। सततं पर+गेह+वासात् लक्ष्मीः अपैति। सज्जनतः दानं ग्राह्यम्। क्षेत्रादिके न सत्। अतिनिन्द्यदानं न कुह अपि।१७। यज्ञ+शिष्ट+अन्नं उत्तमम्। दीक्षित+ब्रह्मिणोः अपि। स्व+अर्थं पक्तं क्व अपि न अद्यात्। यज्ञ+अर्पितं शुभं (अन्नं) अद्यात्।१८।

शिष्य; मातामह यांच्या घरी जेवल्यास दोष नाही. मात्र आचारहीन, परकर्मांत रमणारा, लोभादि रिपूंनी अभिभूत झालेला, कृपण, आपल्या कुटुंबीयांना किंवा गुरूंना कष्ट देणारा यांचे अन्न घेऊ नये.'१५. सतत एखाद्याच्या घरी जेवण घेतल्याने जेवणाऱ्याचे पुण्य जेवू घालणाऱ्याला जाते; तसेच त्याचे पाप जेवणाऱ्याला जाते. शूद्राकरवी ब्राह्मणाच्या घरचे भोजनाचे आमंत्रण आल्यास त्याचप्रमाणे पुण्य-पाप जाते-येते. दर्शादिवशी (अमावास्या) परान्न घेतले तर महिन्याभराचे पुण्य अन्नदात्याला जाते व त्याचे पाप आपल्याला येते.१६. मुलीच्या घरी तिला एक अपत्य झाल्यावर जेवावे. सतत दुसऱ्याच्या घरी राहण्याने लक्ष्मी जाते. सत्प्रवृत्त, स्वधर्मनिष्ठ व्यक्तीकडून दान घ्यावे. पण ते तीर्थाच्या वा क्षेत्राच्या ठिकाणी अथवा ग्रहणादि पर्वांत घेऊ नये. निंद्य दान किंवा महादान कधीही घेऊ नये. सुवर्ण, हत्ती, घोडा, तीळ, दासी, रथ, भूमी, घर, वधू आणि कपिला गाय ही अग्निपुराणात महादाने सांगितली आहेत.१७. यज्ञांत अर्पण करून उरलेले अन्न उत्तम होय. तसेच अग्निहोत्रादि दीक्षा घेतलेल्या ब्राह्मणाचे अन्नही उत्तमच आहे. केवळ आपल्यासाठी शिजवलेले अन्न कुणीही घेऊ नये. यज्ञात अर्पण केलेले पवित्र अन्नच घ्यावे.१८.

**नश्येज्जपादापदि दानदोषः स्वाचारमप्यापदनापदिष्टम् ।**
**विविच्य विप्राः प्रचरन्ति ये न क्वाप्याधिदैन्यर्णगदान्स्पृशन्ति ।।१९।।**
**स्वाचारहीनाः परकर्मसक्तास्तेऽमुत्र चात्रापि सदार्तिभाजः ।**
**तस्माद् द्विजाचारममुं निराशीस् त्वं कर्तुमर्हस्युभयार्थदं वै ।।२०।।**

**।। विप्र उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ दयाब्धे भगवन्प्रभो । सद्गुरो सर्वमाचारं वक्तुमर्हसि मे हरे ।।२१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**विस्तृतोऽब्धिवदाचारो मुनीनामपि दुर्ग्रहः । तस्मात्सारं सद्गतिदं वक्ष्ये शाक्त्यादिसंमतम् ।।२२।।**

आपदि दान+दोषः जपात नश्येत्। स्व+आचार अपि आपत्+अनापत्+इष्टं विविच्य ये विप्राः प्रचरन्ति (ते) क्व अपि आधि+दैन्य+ऋण+गदान् स्पृशन्ति।१९। स्व+आचार+हीनाः पर+कर्म+सक्ताः ते अमुत्र च अत्र अपि सदा आर्ति+भाजः। तस्मात् (हे) द्विज, अमुं आचारं त्वं निराशीः कर्तुं अर्हसि। (तत्) वै उभय+अर्थदम्।२०। विप्र उवाच। '(हे) देवदेव, (हे) जगन्नाथ, (हे) भगवन्, (हे) प्रभो, (हे) सद्गुरो (हे) हरे! मे सर्वं आचारं वक्तुं अर्हसि।'२१। श्रीगुरुः उवाच। 'अब्धिवत् विस्तृतः आचारः मुनीनां अपि दुर्ग्रहः। तस्मात् सद्गतिदं शाक्त्य+आदि+संमतं सारं वक्ष्ये।२२।

संकटामुळे घडलेल्या परिग्रहाचा दोष गायत्रीजपाने किंवा '*पुनर्मामैतु*' इत्यादि दोन मंत्रांच्या जपाने जातो. (आश्वलायन गृह्यसूत्र ३:६:९-१) संकटांत किंवा संकट नसताना कोणता आचार इष्ट आहे ह्याचा विचार करून जे ब्राह्मण वागतात त्यांना, मानसिक आधि, दारिद्र्य, ऋण किंवा रोगराई स्पर्शही करू शकत नाहीत.१९. आपल्या विहित आचाराचा त्याग करून दुसऱ्याचे कर्मांत रमणारे या भूलोकांत किंवा परलोकांतही दुःखच पावतात. त्यासाठी हे ब्राह्मणा, हा आचार तू निष्काम रीत्या करावास. त्यायोगे ऐहिक आणि पारलौकिकही कल्याण साधते.२०. यावर त्या ब्राह्मणाने महाराजांची प्रार्थना केली, 'देवाधिदेवा, जगदीशा, भगवंता, दयासागरा, समर्था, सद्गुरो! आपण मला सर्व आचार सांगावा!'२१.

**आचार आद्यो धर्मो नुः सुखदस्तूभयत्र सः । श्रुतिस्मृतिपुराणोक्त-चरणं विष्णुचिन्तनम् ।।२३।।**
**श्रद्धया देशकालाप्त-दानं पात्रे दया क्षमा । शौचानसूयानायासाऽतृट्ताकार्पण्यमङ्गले ।।२४।।**
**सत्ता दैवीसम्पदेतल् लक्षणो धर्म उच्यते । श्रैष्ठ्यं कर्माप्यते तस्मात्ततो ज्ञानं ततोऽमृतम् ।।२५।।**

आचारः आद्यः धर्मः। स तु नुः उभयत्र सुखदः। श्रुति+स्मृति+पुराण+उक्त+चरणम्; विष्णु+चिन्तनम्;।२३। श्रद्धया पात्रे देश+काल+आप्त+दानम्; दया+क्षमा+शौच+अनायास+अतृट्ता+अकार्पण्य+मङ्गले।२४। सत्ता, दैवी+संपत् एतत् लक्षणः धर्मः उच्यते। तस्मात् कर्म श्रेष्ठ्यं आप्यते। ततः ज्ञानम्। ततः अमृतम्।'२५।

श्रीगुरू सांगू लागले, आचार सागराप्रमाणे विशाल आहे. ऋषी-मुनींनाही त्याचे ज्ञान होणे दुरापास्त आहे. त्यांतील पराशरादि स्मृतिकारांनी मानलेले सार मी तुला सांगत आहे.२२. 'आचार हा पुरातन धर्म आहे. तोच मानवाला इह आणि परत्र सुखदायक आहे. धर्माची लक्षणे अशी आहेत.(१) श्रुति, स्मृति आणि पुराणांत सांगितल्याप्रमाणे वागणे; (२) श्रद्धापूर्वक, योग्य व्यक्तीला, योग्य देशी, योग्य काळी आपल्या ऐपतीप्रमाणे दान करणे; (३) दया, (४) क्षमा, (५) शौच (पावित्र्य), (६) अधिक सायास न करणे, (७) वितृष्णा (निरिच्छा), (८) कृपणतेचा अभाव, (९) मंगलकारक कर्म करणे, (१०) आस्तिक्य आणि दैवी संपत्ती. दैवी संपत्ती म्हणजे शम, दम, तितिक्षा, समाधान, उपरती आणि मुमुक्षा; किंवा भगवद्गीतेत (१६:२-३) सांगितल्याप्रमाणे अहिंसा सत्य, अक्रोध, त्याग, शान्ती, अपैशुन (परनिंदा न करणे), भूतदया, इंद्रियांवर ताबा, मार्दव, दुराचरणाची लज्जा, चंचलता नसणे, तेज, धैर्य, शौच, अद्रोह आणि निरभिमानता. (*अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्।। तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानता। भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत।।*) या धर्माच्या आचरणानेच कर्माला श्रेष्ठता येते. श्रेष्ठ कर्माचरणानेच आत्मज्ञान लाभते आणि आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो.२३-२५.

**श्रुतिस्मृतिपुराणानि धर्ममूलं श्रुतिर्वरा । तद्वैरे द्वौ वृषौ श्रुत्योर्द्वैधे स्मृत्योस्तु लौकिकः ।।२६।।**
**वर्णाश्रमविभागोक्तो देशकालोचितो वृषः । लौकिकोऽपि चतुर्वर्णैः सेवनीयः प्रयत्नतः ।।२७।।**

श्रुति+स्मृति+पुराणानि धर्म+मूलम्। तत् वैरे श्रुतिः वरा। श्रुत्योः द्वैधे द्वौ वृषौ। स्मृत्योः (द्वैधे) लौकिकः।२६। वर्ण+आश्रम+विभाग+उक्तः देश+काल+उचितः वृषः चतुर्वर्णैः लौकिकः अपि प्रयत्नतः सेवनीयः।२७।

श्रुती (वेद), स्मृती आणि पुराणे हेच धर्माचे मूळ आहेत. ह्यांच्यांत परस्पर विरोध आला तर श्रुतिवचनच श्रेष्ठ ठरते. दोन श्रुतींत विरोध उत्पन्न झाल्यास दोन धर्म होतात. दोन स्मृतींत विरोध असेल तर लौकिक धर्माला अनुकूल अशा स्मृतीने सांगितलेल्या धर्माचा अंगीकार करावा.२६. हा धर्म ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी हे चार आश्रम यांच्यासाठी वेगवेगळा सांगितलेला आहे. तसेच त्यात देश, काल यांचा विचारही केलेला आहे. हा चारी वर्णानी प्रयत्नपूर्वक आचरणांत आणला पाहिजे. 'त्रैलोक्याची रचना करण्याचे सामर्थ्य असलेल्या ब्रह्मदेवाची पदवी प्राप्त झाली तरी लौकिक आचाराचे मनानेसुद्धा उल्लंघन करू नये' असे शास्त्रवचन आहे. महाभारतांत (१८:५:६३) सांगितले आहे की, कसल्याही कामनेसाठी, कुणाच्याही भयाने किंवा कशाच्याही लोभाने, अगदी जीव वांचविण्यासाठीही धर्माचा त्याग करू नये. सुख आणि दुःख हे अनित्य आहेत तर धर्म नित्य आहे. जीव नित्य आहे, त्याच्या उपाधी अनित्य आहेत (*न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः। धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः।।*)२७.

**स्वनुष्ठितादन्यधर्माद् विगुणोपि स्वको वरः । स्वगृह्योक्तोऽविरुद्धोऽपि स्मार्तो ग्राह्यो द्विजातिभिः ।।२८।।**
**नित्यं नैमित्तिकं कर्म नातीयात्काम्यमैच्छिकम् । तत्त्यागी क्वापि न सुखी ब्रह्मीभूतमृते भवेत् ।।२९।।**

सु+अनुष्ठितात् अन्य+धर्मात् विगुणः अपि स्वकः वरः। द्विजातिभिः स्वगृह्य+उक्तः अविरुद्धः स्मार्तः अपि ग्राह्यः।२८। नित्यं नैमित्तिकं कर्म न अतीयात्। काम्यं ऐच्छिकम्। तत्+त्यागी ब्रह्मीभूतं ऋते क्व अपि न सुखी भवेत्।२९।

भगवद्गीतेच्या प्रतिपादनानुसार (३:३५) उत्तम प्रकारे आचरलेल्या परधर्मापेक्षा यथातथा आचरलेला आपला विहित धर्म श्रेष्ठ आहे. स्वधर्मांत मृत्यूही आला तरी कल्याणप्रद आहे; परधर्म भयावह आहे आहे (*श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।।*).

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या त्रैवर्णिकांनी आपापल्या शाखेचा गृह्योक्त धर्म आचरावा. त्याच्याशी विरोध नसलेला स्मार्त धर्महही सर्वांना ग्राह्य आहे. *'सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात्'* ब्रह्मसूत्रानुसार (३:३:१) शाखाभेद जरी असला तरी विधींत भेद नसल्याने उपासनेत फरक पडत नाही.२८. संध्योपासना, होम, पंचमहायज्ञ, दर्शादि कर्मे नित्य होत; जातकर्मादि कर्मे नैमित्तिक होत. ही न केल्यास प्रत्यवाय दोष लागतो. यासाठी ती कधीही चुकवू नयेत. काम्यकर्म न केल्याचा कांही दोष शास्त्रांत सांगितलेला नाही. शिवाय ती केल्याने बंधक होऊ शकतात. (*अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते* भ.गीता ५:१२) 'तर मग काम्य कर्मे करूच नयेत असे का सांगीतले नाही?' असे विचाराल तर त्याचे नियमन आसक्त आणि अनासक्त यांच्यासाठी वेगवेगळे केले आहे. तैत्तिरीय उपनिषदांत '*आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः*' (१:११:१) असे वचन आहे. त्यावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे. 'आचार्यांची अनुज्ञा घेऊन अनुरूप पत्नीचे पाणिग्रहण करून प्रजातंतूचा विच्छेद करू नये. पुत्र झाला नाही तर तो व्हावा म्हणून काम्यादि कर्मांचे अनुष्ठान करावे. हे विवेचन आसक्त लोकांसाठी आहे. *लोकोऽपुत्रस्य नास्ति* ह्या

**प्रमादलुप्तकर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिर्विना । अनुतप्तं प्रयत्नाद्धी-दुःसङ्गापहृतक्रिया ।।३०।।**

प्रमाद+लुप्त+कर्मा तु प्रायश्चित्त्या शुचिः। दुःसङ्ग+अपहत+क्रिया हि प्रयत्नात्। विना अनुतप्तम्।३०।

श्रुतीचे मर्म जाणणाऱ्या विरागी लोकांसाठी मात्र बृहदारण्यक उपनिषदांत (४:४:२) वित्तैषणा, लोकैषणा आणि दारैषणा ह्या तिन्हींचा त्याग सांगितला आहे. अशा लोकांना जर तीव्रतर मुमुक्षा असेल तर त्यांनी संन्यास ग्रहण करणेच श्रेयस्कर आहे. इतर आरुरुक्षूंना नित्यनैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान विहित आहे. पण जे मोक्षाला विमुखच आहेत त्यांच्यासाठी काम्यकर्माचे प्रतिपादन केले आहे.

नित्य-नैमित्तिक कर्म सोडणाऱ्याला ना इथे - इहलोकांत, सुख आहे ना परलोकी. याला अपवाद फक्त आत्मसाक्षात्कारी पुरुषाचा आहे. *यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तिश्च मानवः। आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।। नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः।।* भ.गीता ३:१७-१८।। जो आत्मसुखांतच रमलेला आहे, आत्म्यातच तृप्त आहे आणि आत्म्यानेच संतुष्ट आहे त्याला कांहीही कर्म करण्याची आवश्यकता नाही. त्याला न कर्म करण्याचे कांही प्रयोजन असते न कर्म न करण्याचे! त्याला कुणाही जीवापासून कांहीच स्वार्थ साधायचा नसतो.२९.

ज्याचे कर्म अनवधानाने लुप्त झाले आहे त्याची शांडिल्य श्रौतसूत्रानुसार (३:१९:१) प्रायश्चित्ताने शुद्धी होते. वाईट संगतीला लागून, बुद्धिपूर्वक ज्याने आपले कर्म सोडले असेल त्याला शुद्धीसाठी प्रयत्नांची आवश्यकता आहे. याला अपवाद पश्चात्तापाचा आहे. पश्चात्तापाने लगेच शुद्धी होते. पण पश्चात्ताप झाला पाहिजे. तो ईश्वर, गुरू किंवा संत यांच्या कृपेविना होत नाही.३०.

**भजेत्सलक्षणं धर्मं श्रद्धाभक्तियुतो नरः । ब्राह्मणस्तु विशेषेण यतोऽस्मै श्रैष्ठ्यमर्पितम् ।।३१।।**
**दानादाने याजनेज्येऽध्ययनाध्यापने द्विजः । स्नानसन्ध्याजाप्यहोम-पाठयज्ञपरश्चरेत् ।।३२।।**
**वैदिकां तान्त्रिकां मिश्रामाद्यां वैकां चरेत्क्रियाम् । विमलः सुमुखस्नातो द्विराचान्तो गुरूक्तिमान् ।।३३।।**
**त्रिकच्छी धौतसच्छुष्क-द्विवासा यतगोशिखः । मृद्भस्मगन्धान्यतम-लिप्तो दर्भकरः शुचिः ।।३४।।**

श्रद्धा+भक्ति+युतः नरः सलक्षणं धर्मं भजेत्। विशेषतः ब्राह्मणः यतः अस्मै श्रैष्ठ्यं अर्पितम्।३१।स्नान+सन्ध्या+जाप्य+होम+पाठ+यज्ञ+परः द्विजः दान+आदाने, याजन+इज्ये, अध्ययन+अध्यापने चरेत्।३२। वैदिकां तान्त्रिकां मिश्रां वा एकां आद्यां क्रियां चरेत्। विमलः, सुमुखः, स्नातः, द्विः+आचान्तः, गुरु+उक्ति+मान्,।३३। त्रिकच्छी, धौत+सत्+शुष्क+द्विवासा, यत+गो+शिखः, मृत्+भस्म+गन्ध+अन्यतम+ लिप्तः, दर्भकरः, शुचिः।३४।

प्रत्येक माणसाने आपल्या धर्माचे यथासांग आचरण करायला हवे. विशेषतः ब्राह्मणांनी; कारण सर्व वर्णांत त्यांना मोठेपणा दिलेला आहे.३१. स्नान, संध्या, जप, होम, वेदपठण, यज्ञ ह्या कर्मांबरोबरच ब्राह्मणाने दान, परिग्रह, यजन, याजन, अध्ययन आणि अध्यापन ही सहा कर्मे करावीत. त्यांतील परिग्रह, याजन आणि अध्यापन ही उपजीविकेसाठी आहेत; तर इतर अधिक पुण्यसंचयासाठी आहेत.३२. वैदिक आणि तांत्रिक अशा मिश्र विधीने किंवा केवळ वैदिक विधीने गुरूंनी सांगितल्याप्रमाणे कर्म करावे. प्रथम शौचविधि करून मुखमार्जन आणि स्नान करावे. त्यानतंर दोन वेळा आचमन करून(३३) ब्रह्मचाऱ्याने तीन काष्टे असलेले तर गृहस्थाने पांच काष्ठ्यांचे वस्त्र नेसावे. धुवून चांगली वाळविलेली दोन वस्त्रे धारण करावीत. एक कमरेला आणि एक अंगावर. मग शेंडी बांधून मौन धरावे. गोपीचंदन, भस्म किंवा चंदन धारण करावे. हातांत दर्भ घ्यावेत. पावित्र्याने (सोवळ्याने) कर्म करावे.३४.

**पीठस्थोऽन्तर्जानुकरः प्रकुर्यात्कर्म सत्स्थले । उपोषितो विना नैशं कुर्याद्यज्ञजपार्चनम् ।।३५।।**
**दोषो नौषधगव्येक्ष्वप् फलताम्बूलभक्षणे । कर्म संकल्प्य कार्यं सम्पूर्णतास्येश्वरार्पणात्।।३६।।**
**(क्षेपकः) खेऽर्को यत्रैत्युद्गमास्तौ प्राक्प्रत्यक् ते ततोऽपराः ।।**

सत्+स्थले पीठस्थः अन्तः+जानु+करः कर्म प्रकुर्यात्। यज्ञ+जप+अर्चनं, विना नैशं उपोषितः कुर्यात्।३५। औषध+गव्य+इक्षु+अप्+फल+ताम्बूल+भक्षणे न दोषः। कर्म संकल्प्य कार्यम्। ईश्वर+अर्पणात् अस्य सम्पूर्णता।३६। खे यत्र अर्कः अद्गम+अस्तौ ते प्राक्+प्रत्यक्। ततः अपराः।

पवित्र ठिकाणी आसनावर बसून कर्म करावे; हात गुडघ्याच्या आत असावेत. यज्ञ, जप, पूजा हे उपाशीपोटी करावेत. रात्रीच्या कर्माला हा नियम नाही. औषध, दूध, ऊस (रस), पाणी, फळ, तांबूल ही कर्माच्या आधी घेतली तर दोष नाही. कर्म करताना आधी संकल्प करावा. *यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपः पूजाक्रियादिषु न्यूनं सम्पूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम।।* या नारदपुराणाच्या वचनानुसार (पूर्वपाद १ः१७ः१०८) आणि *प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषु यत् । स्मरणादेव तद्विष्णोः सम्पूर्णं स्यादिति श्रुतिः।।* या स्मृतीनुसार कर्माची संपूर्णता ते ईश्वराला अर्पण केल्यानेच होते.३५-३६.

आकांशात सूर्य जिथे उगवतो ती पूर्व दिशा आणि जिथे मावळतो ती पश्चिम दिशा. त्यापासून इतर दिशा काढता येतात. ज्या प्रदेशात पूर्व काढायची असेल तिथे एक वर्तुळ काढावे. त्याच्या मध्यभागी बारा अंगुळांचा एक शंकू ठेवावा. दिवसाच्या पूर्वार्धात शंकूची सावली जिकडे पडेल त्या सावलीच्या टोकावर खूण करावी. ही पश्चिम दिशा होय. दुपारच्यानंतर शंकूची सावली जिथून वर्तुळाच्या बाहेर पडेल ती पूर्व दिशा. आता ह्या दोन्हीच्या मधोमध जो व्यास आहे त्याच्या टोकांना दक्षिण आणि उत्तर दिशा. चार दिशांच्या मध्यबिंदूवरून विदिशा (आग्नेयादि) काढता येतात. हे दिक्साधन ज्या दिवशी सायनांश सूर्य मेष राशीला येतो त्या दिवशी करावे. इतर दिवशी सूर्यक्रांतीनुसार दिशासाधनेचे वेगळे गणित करावे लागेल.

**द्युनक्तं प्रागुदग्वक्त्रो होमाद्येऽग्न्यादिसंमुखः । सौम्यैन्द्र्यैशान्यनुक्तायां दक्षाङ्गं चोपवीतता ।।३७।।**

द्यु+नक्तं प्राक्+उदक्+वक्त्रः। होमाद्ये अग्नि+संमुखः। अनुक्तायां सौम्य+ऐन्द्र+ऐशानि दक्षाङ्गं च उपवीतता।३७।

अशा रीतीने सूर्योदयावरून दिशा निश्चित होतात. सूर्योदय याचा अर्थ सूर्य त्या त्या लोकांतील जीवांना दृग्गोचर होतो तो आणि अस्त म्हणजे सूर्य दृष्टिआड होणे. ज्या लोकात कुणी प्राणीच निवास करीत नाहीत तिथे सूर्य त्या मार्गाने जाऊनही त्याचा उदय होत नाही आणि अस्तही होत नाही. मग अमरकोशांत सांगितल्याप्रमाणे एका महिन्यांत पितरांचे एक अहोरात्र होते, वर्षांत देवांचे अहोरात्र, देवांच्या हजार युगांचे ब्रह्मदेवाचे दोन अहोरात्र इत्यादि कालगणनेचा कसा संदर्भ लावायचा? जसा या भारतवर्षांत साठ घटकांचा (चोवीस तासांचा) अहोरात्र आहे, त्या मानवी मापाने एक महिन्यांत पितरांचा अहोरात्र होतो. अर्थात मानवी शुक्लपक्षात पितृलोकांत सतत सूर्यदर्शन होते आणि कृष्णपक्षात रात्र असते. त्याच प्रकारे स्वर्गातील देवांचा अहोरात्र मानवी वर्षाएवढा असतो. तिथे मानवी उत्तरायणात सतत सूर्य दिसतो व दक्षिणायनात त्याचा अस्त असतो. जेव्हा अमरावतीला सूर्य माध्याह्नाला येतो तेव्हा दक्षिणेला असलेल्या संयमिनीत (यमपुरी) तो उत्तरेकडे उगवताना दिसतो. जेव्हा संयमिनीत सूर्य माथ्यावर येतो तेव्हा वारुणीत तो उगवताना दिसतो. इलावृत चारी बाजूंनी पर्वतांनी वेढलेले असल्याने तिथे सूर्याचा प्रकाश पर्वतावरील छिद्रांतून प्रवेश करीत असल्याने ऊर्ध्व दिशेला उगवतो आणि खाली मावळतो. छांदोग्यात सांगितल्याप्रमाणे (३:११:२) ब्रह्मलोकात सूर्य सततच प्रकाशत असल्याने उदयास्त नाहीत.

दिवसा पूर्वाभिमुख आणि रात्री उत्तराभिमुख बसून कर्म करावे. होमासाठी अग्नीसंमुख (आश्वलायन गृह्यसूत्र १:१०:१५-१६) आणि पूजेसाठी देवसंमुख बसावे. ज्या कर्मात दिशा सांगितली नसेल तिथे पूर्व, उत्तर किंवा ईशान्येकडे मुख करावे. स्थलाचा निर्देश नसेल तर उजव्या अंगाने बसावे. जानवे उपवीतीला (डाव्या खांद्यावर) असावे.३७.

**आसीनत्वं मध्यपाठो देवतीर्थमनुक्तके । निवीतं कण्ठलम्ब्यार्षं दक्षांसस्थं तु पित्र्यकम् ।।३८।।**
**प्राचीनावीतमन्यांसस्थं सूत्रं तूपवीतकम् । भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा दद्ध्यान्नवं विधेः ।।३९।।**
**त्रिघ्नीकृत्य त्रिपद्या षण्णवतिस्वकरोन्मितम् । तूलादिसूत्रं पुनस्त्रिरावृत्य नवसूत्रकम् ।।४०।।**
**कृत्वा त्रिरावृतं ग्रन्थिं दत्वा काजशिवान्नमन् । प्रोक्ष्याब्लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या धेहि मन्त्रवत् ।।४१।।**

अनुक्तके आसीनत्वं, मध्यपाठः, देवतीर्थं। कंठलंबी+आर्षं निवीतं ऋषि+कर्मणि। पित्र्यकं तु दक्ष+अंसस्थम्।३८। अन्य+अंसस्थं तु उपवीतकम्। भ्रष्टं वा त्रुटितं सूत्रं त्यक्त्वा विधेः नवं दध्यात्।३९। षण्+नवति+स्वकर+उन्मितं तूलादि+सूत्रं त्रिपद्या त्रिघ्नी+कृत्य पुनः त्रिः आवृत्य नव+सूत्रकं कृत्वा त्रिः+आवृतं क+अज+शिवान् नमन् ग्रन्थिं दत्वा अप्+लिङ्गैः पङ्क्तिवारं सावित्र्या प्रोक्ष्य मन्त्रवत् धेहि।४०-४१।

स्थिति सांगितली नसेल तर बसून कर्म करावे. पाठ सांगितला नसेल तर मध्यमपाठ असावा. तीर्थ सांगितले नसेल तर देवतीर्थ घ्यावे. जानवे गळ्यात सरळ घातले तर ती निवीती होते; ती ऋषिकर्मांत विहित आहे. पितृकर्मांत जानवे उजव्या खांद्यावर (प्राचीनावीती) असावे.३८. जानवे डाव्या खांद्यावर असल्यास त्याला उपवीती म्हणतात. तसे देवकार्यांत ठेवावे. अस्पृश्य, अंत्यज किंवा अस्पृश्य स्त्री यांना शिवल्यास जानवे भ्रष्ट होते; तसे झाल्यास किंवा तुटल्यास ते जानवे टाकून विधिपूर्वक नवीन धारण करावे.३९. आपल्या हाताने शहाण्णव हात सूत किंवा रेशीमादीचा दोरा त्रिपदी गायत्रीने तिहेरी करावा. तो पुनः तिहेरी करून झालेले नवपदरी सूत्र पुनः तिहेरी करून ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांना नमस्कार करीत त्याला गाठ बांधावी. त्या जानव्याचे *'आपोहिष्ठा'*दि तीन ऋचांनी आणि दहा गायत्रींनी प्रोक्षण करावे. मग *'यज्ञोपवीतं'* इत्यादि मंत्राने ते धारण करावे.४०-४१.

**शश्वद्योज्याः सत्स्थिताग्नि-मन्त्रदर्भासनद्विजाः । पिण्डादिस्थाः कुशा विप्रः प्रेतश्राद्धाच्चितानलः ।।४२।।**
**मन्त्रा गौस्तुलसी नीचेऽसन्तः सन् शोधितो द्विजः । सोङ्कारान् सर्वदा होमे स्वाहान्तान्वामहस्तहृत् ।।४३।।**
**आर्षच्छन्दोदेवताविनियोगज्ञो मनून्जपेत् । शूद्राहृतं द्विजक्रीतं समिद्दर्भाप्सुमाद्यसत् ।।४४।।**

सत्+स्थित अग्नि+मंत्र+दर्भ+आसन+द्विजाः शश्वत् योज्याः। पिण्डादिस्थाः कुशाः, प्रेत+श्राद्धात् विप्रः, चिता+अनलः, नीचे, मन्त्राः, गौः, तुलसी असन्तः। द्विजः शोधितः सन्तः। सर्वदा स+ॐकारान्, होमे वाम+हस्त+हृत् स्वाहा+अन्तान्।४२-४३। मनून् आर्ष+छंदः+ देवता+विनोग+ज्ञः जपेत्। शूद्र+आहृतं द्विज+क्रीतं समित्+दर्भ+अप्+सुम+आदि असत्।४४।

शुभकार्यांत वापरलेले सुस्थितीतील अग्नी, मंत्र, दर्भ, आसन आणि ब्राह्मण यांचा वारंवार उपयोग करावा. पिण्डावर वगैरे टाकलेले दर्भ, एकोद्दिष्ट श्राद्ध जेवलेला ब्राह्मण,(४२) चितेचा अग्नी, नीचाकडचा मंत्र, गाय आणि तुळस हे सर्व अशुभ आहेत. ब्राह्मण संस्कार, प्रायश्चित्त इत्यादींनी शुद्ध होतो. जप, होम इत्यादि सर्व कार्यात मंत्राच्या पूर्वी ॐकार लावून उच्चार करावा. होमाच्या वेळी मंत्राच्या शेवटी स्वाहा लावावे आणि डावा हात हृदयावर धरलेला असावा.४३. *'अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च। योऽध्यापयेद्यजेद्वाऽपि पापीयान्जायते तु सः'* या स्मृतीनुसार (बृहद्देवता ८ः१३६) मंत्रांचा जप करतांना ऋषी, छंद, देवता आणि विनियोग यांचे ज्ञान आवश्यक आहे. समिधा, दर्भ, पाणी, फुले इत्यादी ब्राह्मणांनी स्वतः आणावीत असे धर्मसिंधूंत वचन आहे. ती शूद्राने आणलेली किंवा ब्राह्मणाने विकलेली असतील तर अशुद्ध आहेत.४४.

**अफेनानुच्छिष्टहस्त-नखास्पृष्टामलाम्बु सत् । कुशकाशयवोशीर-गोधूमव्रीहिकुन्दराः ।।४५।।**
**दूर्वामौञ्जस्तृणं दर्भा वर्षामास्वीकृताः शुभाः । मूलतो ब्रह्मविष्ण्वीशा दर्भे सर्वेऽभितोऽमराः ।।४६।।**
**कर्मोत्तरान्तं प्राक्संस्थं व्यस्तं वा पित्र्यमग्निगम् । याम्यन्तं तद्वदास्यं च ज्ञेयोऽङ्गे वामतः क्रमः ।।४७।।**

अफेन+अनुच्छिष्ट+हस्त+नख+अस्पृष्ट+अमल+अम्बु सत्। कुश+काशय+वोशीर+गोधूम+व्रीहि+कुन्दराः दूर्वा+मौञ्जः+तृणं दर्भाः वर्षा+अमा+स्वीकृताः शुभाः। दर्भे मूलतः ब्रह्म+विष्णु+ईशाः अभिते सर्वे अमराः।४५-४६। कर्म उत्तरान्तं प्राक्+संस्थं व्यस्तं वा। पित्र्यं अग्नि+गं याम्यन्तं तत्+वत् आस्यं च। अङ्गे वामतः क्रमः।४७।

पाणी फेसरहित, उष्टे नसलेले, हात किंवा नख न लागलेले आणि स्वच्छ, कर्मासाठी श्रेष्ठ जाणावे. कुश, कास, जव, वाळा,गहू, साळी, कुन्दा, दूर्वा, मुंज आणि गवत हे दहा दर्भ आहेत. ते श्रावणातील अमावास्येला घतलेले शुभ होत. *'अयातयामास्ते दर्भाः विनियोज्याः पुनः पुनः'* या धर्मसिंधूच्या वचनानुसार ते वर्षभर वापरता येतात. दर्भाच्या मुळाशी ब्रह्मा, मध्ये विष्णू, अग्राला शंकर आणि सभोवती सर्व देवता वास करतात.४५-४६. देवकर्म करताना ते पूर्वेकडे स्थापून उत्तरेला संपवावे किंवा उत्तरेकडे स्थापून पूर्वेला संपवावे आणि पितरांचे कर्म आग्नेयेला आरंभ करून दक्षिणेला संपवावे. देवकर्म करतांना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख असावे आणि पितृकर्माचे वेळी दक्षिणेकडे मुख करावे. अंगाविषयी डावीकडून क्रम असावा. ४७.

**तर्जन्यल्पाधःकराग्र-मध्यादिषु यथाक्रमम् । तीर्थं पित्र्यं कायदैवमाग्नेयं ब्राह्ममुच्यते ।।४८।।**
**पित्रर्षिदेवादानोप-स्पर्शकार्यं चरेत्तु तैः । वामान्वारब्धान्यपाणिः कर्माद्यान्ताम्बुदानयुक् ।।४९।।**
**त्वक्फलकृमिरोमोत्थ-श्वेतासृक्पीतमेचकम् । वासो दग्धं द्विजादेः सद्धौतमस्फाटितं स्वकम् ।।५०।।**
**ब्राह्मे मुहूर्त उत्थाय गणेशब्रह्मविष्णवजान् । देवान्नत्वा गुरून्खेटान्गां सच्छ्लोकांश्च संस्मरेत् ।।५१।।**

तर्जनी+अल्प+अधः+कर+अग्र+मध्य+आदिषु यथाक्रमं पित्र्यं कायं आग्नेयं ब्राह्मं तीर्थं उच्यते।४८। पितृ+ऋषि+देव+आदान+उपस्पर्श+कार्यं तैः चरेत्। वामान् वा आरब्ध अन्य पाणिः। कर्म आदि+अंत अम्बु+दान+युक्।४९। त्वक्+फल+कृमि+रोम+उत्थ श्वेत+असृक्+पीत+मेचकं वासः द्विज+आदेः । धौतं अदग्धम् अस्फाटितं स्वकम् सत् ।५०। ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय गणेश+ब्रह्म+विष्णु+अजान् देवान् गुरून् खेटान् गां च नत्वा सत्+श्लोकान् च संस्मरेत्।५१।

उजव्या हाताच्या तर्जनीखाली पितृतीर्थ, करंगळीखाली ऋषितीर्थ, हाताच्या अग्रभागी दैवतीर्थ, मध्यभागी आग्नेय तीर्थ आणि करमूलाजवळ ब्राह्मतीर्थ अशी तीर्थे आहेत. त्यांची योजना अनुक्रमे पितृकर्म, ऋषिकर्म, देवकर्म, प्रतिग्रह (दान घेणे) आणि आचमन यासाठी करावी. कर्माच्या आरंभी डाव्या हाताने उजव्या हाताला स्पर्श करावा. कर्माच्या आरंभी आणि शेवटी पाणी द्यावे.४८-४९. झाडाच्या सालीपासून केलेले पांढरे, कापसाचे लाल, रेशमाचे पिवळे व लोकरीचे निळे (काळे) ही वस्त्रे अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना शुभ आहेत. वस्त्र स्वच्छ धुतलेले, न जळलेले, न फाटलेले आणि आपले स्वतःचे शुभ जाणावे. इथे आचारधर्माची परिभाषा पूर्ण झाली.५०.

ब्राह्म मुहूर्त म्हणजे चिंतनाला योग्य असा रात्रीचा चौथा प्रहर. त्या वेळीं उठून गणेश, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आदि देवांना, तसेच माता, पिता, गुरू इत्यादि वडीलधाऱ्यांना, सूर्यादि ग्रहांना, भूमीला आणि गोमातेला नमस्कार करून धर्मादि पुण्यश्लोकांचे स्मरण करावे.५१.

**ग्रामाद्बहिस्तु नैर्ऋत्यां सद्द्रुम्बध्वादि वर्जिते । स्थलेम्बु दूरात्संस्थाप्य यतनासाक्षिवाक् तृणे ।।५२।।**
**उदङ्मुखोऽन्यथा नक्तमासीनो वस्त्रमस्तकः । आर्षसूत्रं दक्षकर्णे कृत्वा मूत्रविशौ त्यजेत् ।।५३।।**
**लिङ्गं सहाद्भिरप्स्थार्द्र-धात्रीमात्रमृदा गुदम् । त्रिर्वामो दशवारं च करः शोध्याः कराङ्घ्रयः ।।५४।।**
**प्रत्येकं सप्तवारं द्वि-गुणं वीर्येऽर्धमन्यके । वर्णिवानप्रस्थभिक्षोः शौचं द्वित्रिचतुर्गुणम् ।।५५।।**

ग्रामात् बहिः नैर्ऋत्यां सत्+द्रु+अम्बु+अध्व+आदि वर्जिते स्थले, अम्बु दूरात् संस्थाप्य यत+नासा+अक्षि+वाक् उदक्+मुखः नक्तं अन्यथा वस्त्र+मस्तकः आर्षसूत्रं दक्ष+कर्णे कृत्वा मूत्र+विशौ त्यजेत्।५२-५३। अप्+स्थ+आर्द्र+धात्री+मात्र मृदा अद्भिः सह लिङ्गं, गुदं त्रिः, वामः करः दशवारं च शोध्याः। कर+अङ्घ्रयः प्रत्येकं सप्तवारम्। वीर्ये द्विगुणम्। अन्यके अर्धम्। वर्णि+वानप्रस्थ+भिक्षोः द्वि+त्रि+चतुः+गुणं शौचम्।५४-५५।

नंतर गावाच्या बाहेर नैर्ऋत्य दिशेला जाऊन वड, पिंपळ आदि पुण्यवृक्षांपासून, (नदी, तलाव इत्यादि) जलापासून तसेच वाटेपासून दूर जागेवर पाणी दूर ठेवावे; डोक्यावरून नाकावर वस्त्र घेऊन, दृष्टी स्थिर करून, इकडे-तिकडे न पाहता मौन धारण करावे; गवत पसरावे; उत्तरेकडे (रात्री दक्षिणेकडे) तोंड करून, वस्त्र डोईला गुंडाळून, जानवे उजव्या कानाला अडकवून मलमूत्रविसर्जन करावे.५२-५३.

ओल्या आवळ्याएवढ्या ओल्या मातीच्या गोळ्यांनी आणि पाण्याने एक वेळा लिंग, तीन वेळा गुद, दहा वेळा डावा हात, उजवा हात आणि दोन्ही पाय प्रत्येकी सात वेळा स्वच्छ करावेत. वीर्यपातानंतर हेच शौच दुप्पट करावे; मूत्रोत्सर्गानंतर निम्मे करावे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी यांना शौचाचे प्रमाण दुप्पट, तिप्पट आणि चौपट सांगितले आहे.५४-५५.

**अर्धार्धार्धं निशाशक्ति-मार्गेष्वज्ञाबलासु तु । गन्धलेपान्तावधि स्याद् गण्डूषान्वामतस्त्यजेत् ।।५६।।
द्विजो द्वादश चान्योऽल्पान्तर्जन्यास्यं न शोधयेत् । क्षीरिकण्टकिवृक्षाम्र-निम्बापामार्गदारुणा ।।५७।।
द्वादशाङ्गुलमात्रेण द्विजोऽन्योऽल्पेन मन्त्रवत्। शुद्धास्योऽब्गोविशा प्रातः स्नायान्मध्यन्दिनेऽम्मृदा ।।५८।।
भिक्षुर्व्रती त्रिकालं न चिरण्टी शिरसा सदा । शीतैः शीताप्सम्पुटितोष्णकैर्वाब्लिङ्गमन्त्रितैः ।।५९।।**

अर्ध+अर्ध+अर्धं निशा+अशक्ति+मार्गेषु। अज्ञ+अबलासु गन्ध+लेप+अन्त+अवधि स्यात्। द्विजो गण्डूषान् वामतः त्यजेत्, अन्यो अल्पान्। तर्जन्या आस्यं न शोधयेत्। क्षीरि+कण्टकिवृक्ष+आम्र+निम्ब+अपामार्ग+दारुणा द्वादश+अंगुल+मात्रेण द्विजः अन्यः अल्पेन मन्त्रवत् शुद्ध+आस्यः प्रातः अप्+गो+विशा स्नायान्। मध्यन्दिने मृदा।५६-५८। भिक्षुः व्रती त्रिकालं (स्नायात्)। चिरण्टी सदा शिरसा न स्नायात्। शीतैः शीत+अप्+सम्पुष्टित+उष्ण+कैः वा अप्+लिङ्ग+मन्त्रितैः (स्नायात्)।५९।

रात्रीच्या वेळी शौच अर्धे करावे, अशक्तांनी त्याच्या अर्धे आणि प्रवासात त्याच्याही अर्धे करावे. लहान मुले आणि स्त्रिया यांच्यासाठी शौचाची मात्रा केवळ गंध आणि लेप जाईपर्यंतच सांगितली आहे. चुळा डावीकडे टाकाव्यात. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी दहा, वैश्यांनी आठ तर शूद्रांनी चार चुळा भराव्यात. तर्जनीने दात घासू नयेत. पिंपळ, बाभळ, आंबा, निम्ब, आघाडा यांच्या काडीने दात घासावे. ब्राह्मणानी बारा, क्षत्रियांनी आठ आणि वैश्यांनी आठ अंगुलीच्या सालीसह ओल्या काष्ठाने '*मुखदुर्गन्धि*' या मंत्राने दात घासून जीभ रगडून इत्यादि प्रकारे तोंड धुवावे. नंतर प्रातःस्नान गोमय आणि पाण्याने करावे. मध्याह्न काळी मृत्तिकास्नान करावे.५६-५८.

कुटीचक आणि बहूदक संन्याशांनी, वानप्रस्थांनी तसेच चांद्रायणादि व्रत करणाऱ्यानी त्रिकाल स्नान करावे. हंस संन्याशांना एकच वेळ स्नान विहित आहे. सुवासिनींनी नेहमी डोक्यावरून स्नान करू नये. थंड पाण्याने किंवा '*आपोहिष्ठा*' इत्यादि मंत्रांनी मंतरलेल्या संपुष्टित गरम पाण्याने स्नान करावे. संपुष्टित म्हणजे आधी थोडे थंड पाणी घालून त्यानंतर कढत पाणी आणि पुनः वरून थंड पाणी मिसळणे.५९.

**धाम्न्याचमनसङ्कल्प-मार्ष्टितृप्त्यघहारि नो । दीपाल्युत्सवमाङ्गल्याऽब्दाद्येऽभ्यङ्गं सदैच्छिकम् ।।६०।।**
**अनिन्द्याहेऽधवाभिक्ष्वोर्नेदं स्नायान्न शीतकैः । माङ्गल्येऽर्भोत्पत्तिपर्व-क्रान्तिश्राद्धेषु नोष्णकैः ।।६१।।**
**स्नायाद्वान्त्यशुचिस्पर्श-दुःस्वप्नरतिदुर्गमे । नद्यां प्रवाहाभिमुखो वरुणं प्रार्थ्य मन्त्रवत् ।।६२।।**
**स्नात्वा लोड्याम्ब्वम्बुमन्त्रैः स्वमुन्मार्ज्याघमर्षणम् । कृत्वा स्नात्वा तर्पयित्वा जले देवानृषीन्पितृन् ।।६३।।**
**निष्पीड्योदग्दशं वासः शोधिताङ्गो गृहं व्रजेत् । स्रवत्यात्मा सरन्ध्रोऽतः प्रातःस्नानं विशोधनम् ।।६४।।**

धाम्नि आचमन+आचमन+सङ्कल्प+मार्ष्टि+तृप्ति+अघहारि नो। दीपालि+उत्सवे+माङ्गल्ये+अब्दाद्ये अभ्यङ्गं (कार्यम्)। सदा अनिन्द्य+अहे ऐच्छिकम्। अधवा+भिक्षोः इदं न। माङ्गल्ये शीत+कैः न स्नायात्। अर्भ+उत्पत्ति+पर्व+क्रान्ति+श्राद्धेषु उष्ण+कैः न।६०-६१। वान्ति+अशुचि+स्पर्श+दुःस्वप्न+रति+दुर्गमे स्नायात्। नद्यां प्रवाह+अभिमुखः मन्त्रवत् वरुणं प्रार्थ्य स्नात्वा अम्बु आलोड्य अम्बु+मन्त्रैः स्वं उन्मार्ज्य, अघमर्षणं कृत्वा, जले स्नात्वा देवान् ऋषीन् पितन् तर्पयित्वा, वासः उदक्+दशं निष्पीड्य, शोधित+अङ्गः गृहं व्रजेत्। सरन्ध्रः आत्मा स्रवति। अतः प्रातः+स्नानं वि+शोधनम्।६२-६४।

घरी स्नान करताना आचमन, संकल्प, मार्जन, तर्पण आणि अघमर्षण करू नये. दिवाळीच्या सणांत, विवाहादि मंगलकार्याच्या दिवशी, पाडव्याला अभ्यंग स्नान करावे. इतर दिवशी, षष्ठी, अष्टमी आणि चतुर्दशी सोडून ते ऐच्छिक आहे. विधवा आणि संन्यासी यांना अभ्यंगस्नान वर्ज्य आहे. मंगलकार्यादिवशी थंड पाण्याने स्नान करू नये. पुत्रजन्म, पर्वकाल, संक्रान्ती आणि श्राद्ध या दिवशी गरम पाण्याने स्नान करू नये.६०-६१. उलटी झाल्यावर, अपवित्र व्यक्तीचा स्पर्श झाल्यावर, दुःस्वप्नानंतर, मैथुनोत्तर, स्मशानादि स्थानी गेल्यावर स्नान करावे. नदीत स्नान करताना प्रवाहाकडे तोंड करून वरुणाची प्रार्थना करून *'हिरण्यशृंग'* इत्यादि मंत्रांनी स्नान करावे. पाणी लोटून *'आपोहिष्ठा'*दि मंत्रांनी स्वतःवर मार्जन करावे. मग अघमर्षण करून स्नान करावे आणि पाण्यातच देव, ऋषी आणि पितर यांचे तर्पण करावे. मग वस्त्राच्या दशा उत्तरेकडे करून ते पिळावे. त्या वस्त्राने अंग कोरडे करून घरी यावे. हा देह नऊ रंध्रांतून स्रवत असतो. त्यासाठी प्रातःस्नान हे विशेष शोधन आहे.६२-६४.

**त्रिसप्तद्वादशाहं चेत् सन्ध्यास्नानाग्निवर्जितः । द्विजोऽपि शूद्रोऽशक्तश्चेन् मान्त्राद्यन्यतमं चरेत् ।।६५।।**
**हृद्यभौमाग्नेयमान्त्रानिलदिव्यैः शुचिर्हरेः । ध्यानमृद्भस्माम्मनुगो-रजोवर्षात्मकाप्लवैः ।।६६।।**
**मेधाऽलोलुपतारोग्य-रूपतेजोयशोबलम् । शौर्यदुःस्वप्नहृत्यायुर्लभेत्स्नातोऽन्यथापरम् ।।६७।।**
**स्नात्वा मृद्भस्म हुत्वाङ्गे धार्यमभ्यर्च्य चन्दनम् । केशवाद्यैर्द्वादशभिः सिते पक्षेऽसिते परैः ।।६८।।**

त्रि+सप्त+द्वादश+अहं सन्ध्या+स्नान+अग्नि+वर्जितः चेत् द्विजः अपि शूद्रः (भवेत्)। अशक्तः चेत् मान्त्रादि अन्यतमं चरेत्।६५। हृद्य+भौम+आग्नेय+मान्त्र+अनिल+दिव्यैः हरेः ध्यानं+मृत्+भस्म+ अप्+मनु+गोरजः+वर्षात्मक +आप्लवैः शुचिः।६६। स्नातः मेधा, अलोलुपता, आरोग्य, रूप, तेजः, यशः, बलं, शौर्य, दुःस्वप्न+हृति, आयुः लभेत्। अन्यथा अपरम्।६७। स्नात्वा मृत्, हुत्वा भस्म, अभ्यर्च्य चन्दनं अङ्गे धार्यम्। सिते पक्षे केशवाद्यैः द्वादशभिः, असिते परैः।६८।

तीन दिवस संध्या, सात दिवस स्नान आणि बारा दिवस आधान अग्नी टाकल्यास ब्राह्मणसुद्धा शूद्र होतो. स्नान करण्याची शक्ती नसेल तर मंत्रस्नानादि एखादा पर्याय अवलंबावा.६५. हे पर्याय असे - हरीच्या ध्यानाने **मानसिक**, द्वारावती वा अन्य मृत्तिकेच्या लेपाने **पार्थिव** स्नान, भस्मलेपनाने **आग्नेय** स्नान, '*आपोहिष्ठा*'दि मंत्रांनी मंत्रस्नान, गोधूलीयुक्त वारा अंगावर घेतल्याने वायुस्नान आणि ऊन्हात पडणाऱ्या पावसात भिजणे हे **दिव्य** स्नान, यांनी शुद्धता येते.६६. स्नान केल्याने, बुद्धीची धारणाशक्ती, अलोलुपता, आरोग्य, सुरूपता, कांती, कीर्ती, बळ, दुःस्वप्ननाश आणि दीर्घायुष्य लाभते. स्नान न करणाऱ्याला याच्या उलट फळे - बुद्धिमांद्य, लंपटपणा, रोग, कुरूपता, निस्तेज कांती, अपकीर्ती, बलहीनता, दुःस्वप्न आणि अल्पायुष्य मिळते.६७. स्नानानंतर मृत्तिका (गोपीचंदन), होमानंतर भस्म आणि पूजेनंतर चंदन लावावे. शुक्ल पक्षात केशव, नारायण इत्यादि बारा नावांनी व कृष्ण पक्षात संकर्षण, वासुदेव इत्यादि पुढच्या बारा नावांनी गोपीचंदनादि धारण करावे.६८.

**ललाटोदरहृत्कण्ठ-दक्षकुक्षिभुजश्रुतिः । कुक्षिदोः श्रुतिपृष्ठाङ्ग-ककुन्मूलेन कं त्विति ।।६९।।**
**मृद्गन्धितिलकैरङ्क्या भस्मपुण्ड्रैः षडर्णतः । मृताशौचे न गन्धान्न माङ्गल्ये भस्म धारयेत् ।।७०।।**
**गयाश्राद्धाधानपट्ट-प्रेतकृत्योत्तरीयकम् । पादुका रौप्यमुद्रा न क्षौरं जीवत्पिता भजेत् ।।७१।।**
**रौप्यहैमीखड्गमुद्रा-वत्तर्जन्यल्पकाङ्गुलिः । साग्रागर्भचतुर्दर्भ-पवित्रानामिकोऽपि वा ।।७२।।**

ललाट, उदर, हृत्, कण्ठ, दक्ष+कुक्षिः+भुजः+श्रुतिः, कुक्षि+दोः श्रुति, पृष्ठ+अङ्ग, ककुत्+मूलेन कं तु इति मृत्+गन्धि+तिलकैः अंक्या। भस्म पुण्ड्रैः षडर्णतः। मृत+अशौचे गन्धात् न। माङ्गल्ये भस्म न धारयेत्।६९-७०। गयाश्राद्ध, आधान, पट्ट, प्रेतकृत्य, उत्तरीयकं, पादुका, रौप्यमुद्रा, क्षौरं जीवत्+पिता न भजेत्।७१। रौप्य+हैमी+खड्ग+मुद्रावत् तर्जनी+अल्पका+अङ्गुलिः वा स+अग्र+अगर्भ+चतुर्दर्भ+पवित्र+अनामिकः अपि।७२।

कपाळ, पोट, छाती, गळा, उजवी कूस, बाहू आणि कान, डावी कूस, बाहू आणि कान, पाठीवर, पाठीच्या वरच्या भागावर वरील बारा नावांनी लावून *'नमो नारायणाय'* मंत्राने मस्तकावर लावावेत. गोपीचंदन आणि गन्ध यांचे उभे टिळे लावावेत. भस्म तीन बोटांनी '*नमः शिवाय*' मन्त्राने आडवे त्रिपुण्ड्र लावावेत. अशौचात गन्ध लावू नये आणि मंगलकार्यांत भस्म लावू नये.६९-७०.

गयाश्राद्ध, अग्निहोत्र, श्रौतकर्म इत्यादि, योगपट्ट (संन्यासकर्मांतील), उत्तरक्रिया, उत्तरीय वस्त्र, खडावा, चांदीची अंगठी आणि क्षौर ही पिता जिवंत असेल तर वर्ज्य आहेत.७१. तर्जनीत चांदीची, अनामिकेत सोन्याची आणि करंगळीत पोलादाची अशा अंगठ्या धारण कराव्यात; किंवा टोकासह गर्भरहित चार दर्भाची दोन पवित्रे दोन्ही अनामिकांत घालावी.७२.

**मुक्ताङ्गुष्ठाल्पगोकर्णाकृतिहस्तेन कं त्रिभिः । केशवाद्यैः प्राश्य हस्तौ द्वाभ्यां प्रक्षाल्य चाधरौ ।।७३।।**
**द्वाभ्यां प्रोक्ष्यास्यमेकैकात् करं पादौ शिरोऽपरैः । आस्यं नासेक्षिणी कर्णौ नाभिं हृत्के भुजौ स्पृशेत् ।।७४।।**
**नासां साङ्गुष्ठतर्जन्याङ्गुष्ठेनास्यं च दृक्श्रुती । सानामिकेन साल्पेन नाभिं करतलाग्रतः ।।७५।।**
**हृद्बाहून्कं च सर्वाभिः स्पृशेदाचमनं त्विदम् । त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः स्पृशेत्कर्णमसंभवे ।।७६।।**

मुक्त+अङ्गुष्ठ+अल्प+गोकर्ण+आकृति+हस्तेन केशव+आद्यैः कं प्राश्य, द्वाभ्यां हस्तौ प्रक्षाल्य च द्वाभ्यां अधरौ प्रक्षाल्य, एक+एकात् आस्यं, (वाम)करं, अपरैः पादौ, शिरः, आस्यं, नासा, अक्षिणी, कर्णौ, नाभिं, हृत्, के, भुजौ स्पृशेत्।७३-७४। स+अङ्गुष्ठ+तर्जन्या नासां, अङ्गुष्ठेन आस्यं च, स+अनामिकेन स+अल्पेन दृक्+श्रुती, करतल+अग्रतः नाभिं हृत्, बाहुं च कं सर्वाभिः स्पृशेत्। इदं तु आचमनम्। असंभवे त्रिभिः पीत्वा शुद्धपाणिः कर्णं स्पृशेत्।७५-७६।

अंगठा आणि करंगळी मोकळी सोडून मधली तीन बोटे एकत्र धरून तळहात गाईच्या कानाप्रमाणे सखल करावा. त्यात पळीभर पाणी घेऊन (उडदाचा दाणा बुडेल इतके. आचमनाच्या वेळी उणे अधिक जलपान हे सुरापानासमान मानले आहे.) ते देवतीर्थाने (मनगटावरून) *'केशवाय स्वाहा'*, *'नारायणाय स्वाहा'* आणि *'माधवाय स्वाहा'* ह्या नामांनी तीन वेळा प्यावे. मग *'गोविंदाय नमः'* या नामाने उजवा व *'विष्णवे नमः'* या नामाने डावा हात धुवावा. मग *'मधुसूदनाय नमः'* व *'त्रिविक्रमाय नमः'* ह्या दोन नामांनी ओठांना पाणी लावावे. *'श्रीधराय नमः'* या नामाने पुन्हा हात धुवावा. *'हृषीकेशाय नमः'* आणि *'पद्मनाभाय नमः'* ह्या नावांनी पायांना, *'दामोदराय नमः'* नावाने डोक्याला, *'संकर्षणाय नमः'* म्हणत मुखाला, *'वासुदेवाय नमः'* व *'प्रद्युम्नाय नमः'* या नावांनी नाकपुड्यांना, *'अनिरुद्धाय नमः'* व *'पुरुषोत्तमाय नमः'* यांनी डोळ्यांना, *'अधोक्षजाय नमः'* व *'नरसिंहाय नमः'* यांनी कानांना, *'अच्युताय नमः'* याने बेंबीला, *'जनार्दनाय नमः'* या नावाने हृदयाला, *'उपेन्द्राय नमः'* म्हणून डोक्याला, *'हरये नमः'* आणि *'श्रीकृष्णाय नमः'* या नावांनी बाहूंना स्पर्श करावा. त्यानंतर अंगठा व तर्जनी यांनी नाकाला, अंगठ्याने मुखाला, अंगठा व अनामिकेनी डोळ्यांना, अंगठा व करंगळी यांनी कानांना, हाताच्या तळव्याने नाभीला, हाताच्या टोकाने हृदयाला आणि बाहूंना तसेच सर्व बोटांनी मस्तकाला स्पर्श करावा. म्हणजे आचमन पूर्ण होते. एवढे सगळे शक्य नसेल तर वरीलप्रमाणे तीन वेळा पाणी पिऊन हात धुतल्यावर कानाला स्पर्श करावा.७३-७६.

**माषमज्जनमात्राम्बु-पानेऽथ द्विरुपस्पृशेत् । मूत्राद्युत्सर्गशुद्ध्यूर्ध्वं स्नाने दाने सुरार्चने ।।७७।।**
**प्राक्परे कर्मसन्ध्यासु सुप्ते वासोधृतौ क्षुते । कासश्वासागमादानाध्ययनाशुद्धभाषणे ।।७८।।**
**श्मशानचत्वारगतौ पच्छौचे स्वाऽन्ययोः कृते । आचामेद्धीनसंभाषे स्त्रीशूद्रोच्छिष्टभाषणे ।।७९।।**
**रक्ताश्रुपातेऽसुयामे जलोत्तारेऽभिवादने । उच्छिष्टस्पर्शेऽपाने च याते कर्णं स्पृशेत्तु वा ।।८०।।**
**विप्रदक्षश्रुतौ देव-पाशीनेन्द्वग्न्यबाशुगाः । सन्ध्याज्ञानाद्भवेच्छूद्रः सन्ध्याहीनोऽशुचिर्द्विजः ।।८१।।**

पाने माष+मज्जन+मात्र अम्बु द्विः उपस्पृशेत्। मूत्र+आदि+उत्सर्ग+शुद्धि+ऊर्ध्वं; स्नाने, दाने, सुर+अर्चने, कर्म+सन्ध्यासु प्राक्, परे। सुप्ते, वास+उधृतौ, क्षुते, कास+श्वास+आगम+आदान+अध्ययन+अशुद्ध+भाषणे, श्मशान+चत्वार+गतौ, स्व+अन्ययोः कृते पत्+शौचे, हीन+संभाषे, स्त्री+शूद्र+उच्छिष्ट+भाषणे आचमेत्। रक्त+अश्रु+पाते, असुयामे, जल+उत्तारे, अभिवादने, उच्छिष्ट+स्पर्शे, अपाने याते च (आचमेत्) वा कर्णं तु स्पृशेत्।७७-८०। विप्र+दक्ष+श्रुतौ देवाः पाशी+इन+इन्दु+अग्नि+अप्+आशुगाः। द्विजः सन्ध्या+अज्ञानात् शूद्रः भवेत्। सन्ध्याहीनः अशुचिः।८१।

आचमनाच्या वेळी एक उडीद बुडेल इतकेच पाणी प्यावे. आचमन नेहमी दोन वेळा करावे. मूत्रादि उत्सर्गाच्या शुद्धीनंतर द्विराचमन करावे. स्नान, देवपूजा, देव-पितरादि कर्म आणि संध्या यांच्या पूर्वी आणि नंतर द्विराचमन करावे. झोपून उठल्यावर, वस्त्र नेसल्यावर, शिंक आल्यावर, खोकला किंवा दम लागल्यावर, अध्ययनानंतर, अशुची व्यक्तीशी भाषण केल्यावर, श्मशान किंवा चौरस्त्यावर गेल्यास, आपण स्वतः किंवा इतरांनी आपले पाय धुतल्यावर, हीनाशी संभाषण केल्यावर, स्त्री, शूद्र किंवा उष्टा (जेवणानंतर न आंचवलेला) यांच्याशी बोलल्यावर दोन वेळा आचमन करावे. रक्त किंवा अश्रू यांचा स्राव झाल्यावर, प्राणायामानंतर, पाण्यातून पोहून आल्यावर, अभिवादन केल्यावर, उष्ट्याचा स्पर्श झाल्यावर किंवा अपान वायू गेल्यावर आचमन करावे. किंवा कर्णस्पर्श तरी करावा.७७-८०. ब्राह्मणाच्या उजव्या कानात वरुण, सूर्य, चंद्र, अग्नी, जल, आणि वायू या देवता वसतात. ज्याला संध्या येत नाही असा ब्राह्मणही शूद्र होतो. संध्या न केलेला ब्राह्मण अपवित्र असतो.८१.

**विना संध्यावन्दनेन नाधिकारोऽन्यकर्मसु । सम्यग्ब्रह्मात्र ध्यायन्ति विप्राः सन्ध्या ततः स्मृता ।।८२।।**
**भाढ्या भहीनार्कयुक्ता तूत्तमा मध्यमाधमा । प्रातःसंध्याऽपरा तद्वत् सार्कार्कोना च भान्विता ।।८३।।**
**त्रिनाड्यधस्तामकृत्वा चतुर्थार्घ्यं प्रदापयेत् । अध्यर्धयामादासायं संध्या मध्याह्निकी स्मृता ।।८४।।**
**धृत्वानामिकाङ्गुष्ठैर् यतिवर्णी च पञ्चभिः । अन्यो नासां शनैर्वायुं सव्ययापूर्य शक्तितः ।।८५।।**
**प्रणवव्याहृतीः सप्त गायत्रीं शिरसा सह । त्रिर्जपन्कुम्भितं मन्दं दक्षनाड्या विरेचयेत् ।।८६।।**

सन्ध्या+वन्दनेन विना अन्य+कर्मसु अधिकारः न। अत्र विप्राः सम्यक् ब्रह्म ध्यायन्ति ततः सन्ध्या स्मृता।८२। प्रातः+सन्ध्या भा+आढ्या उत्तमा, भ+हीना मध्यमा, अर्क+युक्ता तु अधमा। अपरा तद्वत् स+अर्का (उत्तमा), अर्क+ऊना (मध्यमा) च भ+अन्विता (अधमा)।८३। त्रि+नाडी+अधः तां अकृत्वा चतुर्थ अर्घ्यं प्रदापयेत्। अधि+अर्ध+यामात् आसायं मध्याह्निकी संध्या स्मृता।८४। यति+वर्णी अल्पा+अनामिका+अङ्गुष्ठैः, अन्यो पञ्चभिः नासां धृत्वा सव्यया शनैः आपूर्य प्रणव सप्त व्याहृतीः गायत्रीं शिरसा सह कुम्भितः त्रिः जपन् मन्दं दक्ष+नाड्या विरेचयेत्।८५-८६।

संध्यावन्दन केल्याशिवाय इतर कर्मांचा अधिकार प्राप्त होत नाही. ब्राह्मण ब्रह्माचे सम्यक् (**सं**) ध्यान (**ध्या**) करतात म्हणून तिला संध्या म्हणतात.८२. आकाशात नक्षत्रे दिसत असतानाच केलेली प्रातःसंध्या उत्तम, नक्षत्रे मावळली असता केलेली मध्यम आणि सूर्योदयानंतर केलेली कनिष्ठ जाणावी. त्याचप्रमाणे सायंसंध्या सूर्य मावळायच्या आधी उत्तम, तो मावळल्यावर मध्यम आणि तारे उगवल्यावर कनिष्ठ जाणावी.८३. संध्येला तीन घटकांपेक्षा अधिक विलंब झाला तर प्रायश्चितासाठी चौथे अर्घ्य द्यावे. मध्याह्न संध्येचा काळ दीड प्रहर दिवसापासून संध्याकाळपर्यंत सांगितला आहे. प्रातः, संगव, मध्याह्न, पराह्ण आणि सायाह्न असे दिवसाचे पाच मुख्य भाग आहेत.८४. संन्यासी आणि ब्रह्मचारी यांनी करंगळी, अनामिका आणि अंगठा यांनी आणि गृहस्थ-वानप्रस्थांनी पाची बोटांनी नाक धरून अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून, डाव्या नाकपुडीने (इडा) हळूहळू पूरक करावा (श्वास आत घ्यावा). मग हनुवटी छातीला टेकवीत

**कार्योऽन्यथासुयामान्यो मूलबन्धोऽत्र सत्तमः । जालन्धरोड्डियाणाख्यौ कुम्भके रेचके हितौ ।।८७।।**

अन्यः असुयामः अन्यथा कार्यः। अत्र मूलबन्धः सत्तमः। जालन्धर+उड्डियाण+आख्यौ कुम्भके रेचके हितौ।८७।

कुंभक करून कार, सात व्याहृति गायत्री आणि शिरस यांचा तीन वेळा जप करावा आणि मग उजव्या नाकपुडीने श्वास उड्ड्याणबंध करून (पोट आत ओढून) हळूहळू सोडावा (रेचक). पूरकाच्या दुप्पट रेचकाचा काळ सांगितला आहे. अधिक वेगाने रेचक केल्यास बलहानी होऊ शकते.८५-८६.

दुसरा प्राणायाम करायचा असेल तर उलटा करावा. म्हणजे उजव्या नाकपुडीने (पिंगलेने) पूरक करून इडेने रेचक करावा. (हठयोगप्रदीपिका २:१०). कुम्भक करताना जालन्धर बंध चांगला तर रेचक करताना उड्डियाण बंध चांगला. हठयोगप्रदीपिकेत (३:७१) सांगितल्याप्रमाणे शिरांतील जालाचे बंधन करून अधोगामी नभोजल अडवतो तो जालंधर बंध. योगतारावलीत भ.पू.पा. शंकराचार्यांनी ह्या तीनही बंधांचे वर्णन असे केले आहे. गळा, पोट आणि गुदद्वार या तीन ठिकाणी जालंधर, उड्डियाण आणि मूल ह्या बंधत्रयांची ओळख पटली तर कालपाशाचा बंध कसा पडेल? उड्डियाण, जालंधर आणि मूल या बंधांनी जागलेली सर्पिणी पश्चिममुखांत प्रविष्ट झाली की वायूचे येणे-जाणे थांबते. (*जालंधरोणड्उानमूलबन्धान् जल्पन्ति कण्ठोदरपायुमूले। बन्धत्रयेऽस्मिन्परिचीयमाने बन्धः कुतो दारुणकालपाशैः।।१।। उड्याणजालन्धरमूलबन्धैरुन्निद्रितायामुरगाङ्गनायां। प्रत्यङ्मुखत्वात्प्रविशन्सुषुम्णां गमागमौ मुञ्चति गन्धवाहः।।२।।*)

अशा प्राणाचा निरोध केल्यावर प्रथम *ॐकार आणि भूः* इत्यादि व्याहृतींचा उच्चार करताना त्यांच्या भूः म्हणजे सर्व पदार्थांनी युक्त असा हा भूलोक आणि *ॐ* म्हणजे ब्रह्म असा विवेक आहे. *भूः*, *भुवः*, स्वः इत्यादि लोकांना ब्रह्मदृष्टीने पाहायचे आहे. ब्रह्म हे सर्वांत श्रेष्ठ असून भूर्भुवः इत्यादींना त्या पातळीला नेऊन ध्यान करावे (*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्*) असे ब्रह्मसूत्र (४:१:५) आहे.

**प्राणायामोऽघनिघ्नोऽयं कार्यः सर्वेषु कर्मसु । ग्रामाद्बहिः स्याद्द्विगुणं नद्यां शतगुणं फलम् ।।८८।।**
**तीर्थे सहस्रं सन्ध्यायामनन्तं सान्ध्यकर्मजम् । बहिःसंध्या सुरापानानृतोक्त्याद्यघहारिणी ।।८९।।**
**संध्यामुपासिष्य इति संकल्प्यादाय मार्जयेत् । गोकर्णाकृतिताम्रादि-पात्रे वामकरेऽप्यपः ।।९०।।**
**वरान्तैर्नान्तैः सथान्तैः क्रमात्के पादयोर्हृदि । आपोहिष्ठेति पच्छोपः प्रातर्मध्यन्दिने निशि ।।९१।।**
**सूर्यश्चापः पुनन्त्वग्निश्चेति प्राश्य ह्युपस्पृशेत् । सोङ्कारव्याहृत्योङ्कारयुग्देव्यप्सूक्ततो द्विजः ।।९२।।**

अयं अघ+निघ्नः प्राणायामः सर्वेषु कर्मसु कार्यः। ग्रामात् बहिः द्विगुणं फलं, नद्यां शतगुणं, तीर्थे सहस्रम् गङ्गायां अनन्तं सान्ध्य+कर्म+जं फलं स्यात्। बहिः+सन्ध्या सुरा+पान+अनृत+उक्ति+आदि+अघ+हारिणी।८८-८९। संध्यां उपासिष्य इति सङ्कल्प्य गोकर्णाकृति ताम्रादि पात्रे, वामकरे वा अपः आदाय मार्जयेत्।९०। आपोहिष्ठा इति पत्+शः क्रमात् वः+अन्तैः के, न+अन्तैः पादयोः 'स'+'थ'+अन्तैः हृदि अपः मार्जयेत्।९१। प्रातः 'सूर्यश्च' मध्यन्दिने 'आपः पुनन्तु' निशि 'अग्निश्च' इति आपः प्राश्य हि उपस्पृशेत्।९२।

हा पापनाशक प्राणायाम सर्वच कर्मांत अवश्यमेव करावा. त्यानंतर आचमन किंवा श्रोतृस्पर्श करावा. संध्येचे फळ गावापेक्षा गावाबाहेर - जलाशयादि स्थानी दुप्पट, तर नदीकाठी शतपट मिळते.८८. संध्याकर्माचे फल तीर्थस्थानी हजारपट तर गंगेत अनंतपट सांगितले आहे. बाहेर केलेल्या संध्येने सुरापान, असत्य भाषण इत्यादि पापांचा परिहार करते.८९. '*संध्यां उपासिष्ये*' असा संकल्प करून, गाईच्या कानाच्या आकाराच्या तांबे, चांदी इत्यादीच्या पात्रात किंवा डाव्या हातात पाणी घेऊन मार्जन करावे.९०. सकाळ, दुपार आणि सायंकाळी आपोहिष्ठादि तीन ऋचांच्या पादांनी पादाचे अंतिम अक्षर '*वः*' असेल तर डोक्यावर, '*न*' असेल पायांवर आणि '*स*' किंवा '*थ*' असेल छातीवर क्रमशः पाणी शिंपडून मार्जन करावे. मग प्रातःसंध्येत '*सूर्यश्च*', माध्याह्न संध्येत '*आपः पुनन्तु*' आणि सायंसंध्येत '*अग्निश्च*' या मंत्रांनी पाणी पिऊन आचमन करावे. या मंत्राचमनानंतर ॐकारासहित सात व्याहृती आणि ॐकारसहित गायत्री तसेच आपोहिष्ठादि नऊ ऋचांनी मस्तकावर मार्जन करावे.९१-९२.

**मार्जयेत्प्रतिमंत्रं के ऋतं चेति तृचान्तरे । निःश्वास्याघनरं स्मृत्वा दक्षनासापुटेन तं ।।९३।।**
**बहिर्निःसार्य हस्तेऽप्सु पतितं नावलोकितं । क्षिप्त्वा क्षितौ वामभाग आचम्याप्पूरिताञ्जलिः ।।९४।।**
**गोशृङ्गमात्रमुद्धृत्याञ्जलिं व्यङ्गुष्ठतर्जनीम् । तिष्ठन्ध्यायन्संमुखोऽर्कं देव्यार्घ्यं त्रिर्निवेदयेत् ।।९५।।**
**असावादित्यो ब्रह्मेति ध्यात्वासिच्य प्रदक्षिणम् । परीत्याचामेन्मध्याह्ने नतोऽर्घ्ये हंस इत्यृचा ।।९६।।**
**जपेद्गृहाद्बहिर्द्विघ्नं त्रिघ्नं नद्यां शतं फलम् । गोष्ठे वनेऽग्निहोत्रे च हरहर्यग्रतोऽमिति ।।९७।।**

स+कार+व्याहृति+ॐकार+युक्+देवी अप्+सूक्ततः द्विजः प्रतिमंत्रं के मार्जयेत्। 'ऋतं च' इति ऋचा अंतरे निःश्वास्य अघनरं स्मृत्वा तं दक्ष+नासा+पुटेन बहिः निःसार्य हस्ते अप्सु पतितं न अवलोकितं वामभागे क्षितौ क्षिप्त्वा आचम्य अप्+पूरित+अञ्जलिः...।९३-९४। संमुखः तिष्ठन् अर्कं ध्यायन् वि+अङ्गुष्ठ+तर्जनीं अञ्जलिं गो+शंङ्ग+मात्र उद्धृत्य देव्या अर्घ्यं त्रिः निवेदयेत्।९५। 'असावादित्यो ब्रह्म' इति प्रदक्षिणम् परीत्य आसिच्य आचामेत्। मध्याह्ने अर्घ्ये नतः 'हंस' इति ऋचा (अर्घ्यं दद्यात्)।९६। जपे गृहात् बहिः द्विघ्नं, नद्यां त्रिघ्नं, गोष्ठे शतगुणं, वने, अग्निहोत्रे च हर+हरि+अग्रतः अमिति।९७।

**अघमर्षण -** 'ऋतं चेति' या तीन ऋचांनी आपल्या हातातले पाणी हुंगून पापपुरुषाचे स्मरण करावे आणि उजव्या नाकपुडीने त्याचे बाहेर हातांतल्या पाण्यांत निःसारण करावे आणि ते पाणी न पाहता डाव्या बाजूला जमिनीवर टाकावे.९३-९४.

**अर्घ्य -** ओंजळीत पाणी घेऊन सूर्याभिमुख उभे राहून त्याचे ध्यान करीत अंगठा आणि तर्जनी वगळलेल्या ओंजळीने पाणी गाईच्या शिंगाइतकी दूर धरून ओंजळीतील पाणी वर उचलून गायत्रीमंत्राने तीन वेळा अर्घ्य द्यावे.९५.

अर्घ्यदानानंतर *'असावादित्यो ब्रह्म'* या मंत्राने सूर्याचे ध्यान करीत, जो या पुरुषात आहे तोच त्या आदित्यांत आहे या श्रुतीच्या (तैत्तिरीय उपनिषद २:८) साराचे चिंतन करीत, आपल्याभोवती पाणी शिंपडत उजवी प्रदक्षिणा करावी आणि आचमन करावे. माध्याह्न संध्येत *'हंसः शुचिषत्'* या मंत्राने वाकून अर्घ्य द्यावे.९६. घराबाहेर जप केल्यास दुप्पट फळ, नदीवर केल्यास तिप्पट, गोठ्यात शतगुण, वनांत, अग्निहोत्रस्थानी किंवा हरिहरांच्या मूर्तीसमोर अपरिमित फळ लाभते.९७.

**काष्ठासनेऽकीर्त्यकर्णं दौरात्म्यं पल्लवेंऽशुके । दैन्यं रुग्ग्राव्ण्यथाऽऽरोग्यं भसिते कम्बले सुखम् ॥९८॥**
**विदैणेयेजिने द्वैपे मोक्षः प्रज्ञायुषी कुशे । व्याहृत्यास्मिन्सिद्धपद्म-स्वस्तिकाद्यासनात्सुखं ॥९९॥**
**उपविश्य क्षमां प्रार्थ्य भूतान्युत्सार्य भावयेत् । यथाङ्गमात्मन्यात्मानं देव्या तद्रूपमेकधीः ॥१००॥**

काष्ठ+आसने अकीर्ति+अक+ऋणं, पल्लवे दौरात्म्यं, अंशुके दैन्यं, ग्राव्णि रुक्, भसिते आरोग्यं, कम्बले सुखं,।९८। ऐणेये अजिने विद्, द्वैपे मोक्षः, कुश+आसने प्रज्ञा+आयुषी। अस्मिन् सिद्ध+पद्म+स्वस्तिक+आदि आसनात् सुखं व्याहृत्या उपविश्य,।९९। क्षमां प्रार्थ्य, भूतानि उत्सार्य, एक+धीः यथा अङ्गं देव्या आत्मनि आत्मानं तत्+रूपं भावयेत्।१००।

**आसनविचार -** लाकडाच्या आसनावर बसल्यास अपकीर्ती, दुःख आणि ऋण, पानाच्या आसनावर किंवा वस्त्रावर बसल्यास दुःस्वभाव, दगडावर बसल्यास दैन्य आणि रोग अशी फळे आहेत. अर्थात वरील आसनांवर बसू नये. भस्मावर बसल्यास आरोग्य, लोकरीच्या आसनावर सुख, मृगाजिनावर ज्ञान, व्याघ्राजिनावर मोक्ष आणि कुशासनावर बुद्धी आणि आयष्याची वृद्धी अशी फळे आहेत. अर्थात या आसनांवर बसावे. हे झाले ज्याच्यावर बसायचे (*आस्यते अस्मिन इति आसनम्*) त्या आसनाविषयी. आता ज्या पद्धतीने बसायचे (*आस्यते अनेन इति आसनम्*) त्याविषयी सांगतात. सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादींपैकी एका आसनावर सात व्याहृतींचा उच्चार करून विधिपूर्वक सुखाने बसावे. या आसनांचे वर्णन हठयोगप्रदीपिकेत (१:२१,२५,३७) पाहावे.९८-९९.

*'पृथ्वि त्वया'* या मंत्राने भूमीची प्रार्थना करून, *'अपसर्पन्तु ते भूता'* आणि *'अपक्रामन्तु भूतानि'* या मंत्रांनी भूतांना दूर सारून, एकचित्ताने गायत्री आपल्या हृदयादि अंगांत कल्पून आपण तद्रूप आहोत अशी भावना करावी.१००.

**आर्षदैवतछन्दांसि स्मरन्नक्षरपूर्वकान् । न्यासान्कृत्वाऽखिला मुद्राः प्रदर्श्य मनुदेवताम् ॥१०१॥**
**तां बालां बालादित्येति त्रिभिर्ध्यानैस्त्रिकालतः । ध्यात्वा चागच्छ वरद इति तिष्ठन्समाहितः ॥१०२॥**
**प्रागास्यो मन्त्रार्थमनु-सन्दधानो जपेच्छनैः । सोङ्कारव्याहृतिं देवीं छिन्नपादां स्रजांशुके ॥१०३॥**

आर्ष+दैवत+छंदांसि स्मरन् अक्षर+पूर्वकान् न्यासान् कृत्वा, अखिला मुद्रा प्रदर्श्य मंत्रदेवतां (स्मरन्)।१०१। 'तां बालां बालादित्य' इति त्रिभिः ध्यानैः त्रिकालतः च 'आगच्छ वरदे' इति ध्यात्वा समाहितः प्राक्+आस्यः तिष्ठन् मंत्र+अर्थ+अनुसंधानः स+ओंकार+व्याहृतिं छिन्न+पादां देवीं अंशुके स्रजा शनैः जपेत्।१०२-१०३।

गायत्रीमंत्राचे विश्वामित्र ऋषी, सविता देवता आणि गायत्री छंद यांचे स्मरण करून गायत्रीच्या चोवीस अक्षरांनी न्यास करून मंत्रदेवतेला सर्व मुद्रा दाखवाव्यात. देवी या पदाने इथे गायत्री जाणावी. आत्मस्वरूपाचे यथार्थ प्रकाशन तीच करते. तीच ब्रह्मज्ञानाचे उपादान - प्रमुख साधन आहे. कारण तीच सर्व छंदांत प्रधान आहे; ती सोमाचे आहरण करते; इतर छंदांची अक्षरे तिच्यात सामावलेली असल्याने ती सर्व छंदांना व्यापून आहे; ती सर्व सवनांना व्यापून आहे. या कारणांनी मंत्रजपात गायत्रीलाच प्राधान्य आहे. विशेषतः ब्राह्मणांचे सत्त्व गायत्रीच आहे. म्हणूनच सर्वश्रेष्ठ गायत्रीमंत्र सोडून इतर कोणताही श्रेष्ठतर मंत्र नाही. त्यासाठी संन्याशांशिवाय इतर सर्व द्विजातींनी तीनही काळात (प्रातः, मध्याह्न, सायं) गायत्रीचाच जप करावा.१०१.

पुढे त्या गायत्रीचे सकाळी '*तां बालां बालादित्यमंडलस्थां*' हे ब्राह्मी, मध्याह्नाला वैष्णवी आणि सायंकाळी शैवी या तीन ध्यानांपैकी कालानुरूप, '*आगच्छ वरदे देवी*' म्हणत गायत्रीचे ध्यान करावे.१०२. मग चित्त समाहित (एकाग्र) करून पूर्वाभिमुख उभे राहावे. गायत्रीमंत्राच्या अर्थाकडे लक्ष देत, ओंकार आणि व्याहृतींसह गायत्रीचा तीन पाद तोडून सावकाश जप करावा. माळ वस्त्रांत धरलेली असावी.१०३.

**मत्रकारौ मनस्त्राणौ तद्योगान्मन्त्र उच्यते । जन्मविच्छेदपापघ्नौ जपकारौ तु तद्युजा ।।१०४।।**

म+त्र+कारौ मनः+त्राणौ तत् योगात् मन्त्र उच्यते। जन्म+विच्छेद+पापघ्नौ ज+प+कारौ तु तत् युजा।१०४।

**गायत्री मंत्राचा संक्षिप्त अर्थ.**

**तत्** म्हणजे गीतेच्या वचनानुसार (१७:२३) परब्रह्म;

**सवितुः** सविता म्हणजे प्रसविता - जनिता. हे सृष्टी, प्रलय आणि स्थिती यांचे उपलक्षण. या संपूर्ण चराचर जगदाभासाचे अधिष्ठानभूत परब्रह्म;

**वरेण्यं** सूक्ष्म बुद्धीनेच आकळण्याजोगे निरतिशय आत्मस्वरूप;

**भर्गो** सर्व अनर्थांचे मूळ असणाऱ्या अविद्या, काम, कर्म आदि दोषांचे भर्जन करणारे, त्यांना जाळून टाकणारे (स्वरूप);

**देवस्य** द्योतनात्मक - स्वयंप्रकाश आणि सर्वप्रकाशक; गीतेच्या (१५:६) भाषेत जिथे न सूर्य प्रकाशतो, न चंद्र न अग्नी, जिथे पावल्यावर पुन्हा संसारात परतत नाही ते माझे परम धाम आहे. (*न तद्भासयते सूर्यो न शंशाङ्को न पावकः। यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।।*). याच अर्थाचा मंत्र कठ उपनिषदांतही (२:५:१५) आहे.

**धीमही** (आम्ही) चिंतन करतो.

**यः** जो जीवात्म्याहून अभिन्न असा परमात्मा.

**नः** आमच्या

**धियः** बुद्धीच्या वृत्तीना

**प्रचोदयात्** प्रेरणा करो.

**प्रोक्तो जपो हि यज्ञोऽयं सर्वयज्ञेषु तूत्तमः। वाचिकोऽसन्मानसः सन् रहस्यो मध्यमो जपः ।।१०५।।**

सर्व+यज्ञेषु तु अयं जपः हि उत्तमः प्रोक्तः। वाचिकः जपः असन्, मानसः सन् रहस्यः मध्यमः।१०५।

सारांश, सर्वसाक्षी, अखिल द्वैतभ्रमाचे अधिष्ठान, परमानंदस्वरूप, सर्व अनर्थांचा निरास करणारे, स्वप्रकाश, चिद्रूप अशा ब्रह्माचे चिंतन करावे. असे चिंतन केल्याने ब्रह्मावर, दोरीवर जसा सापाचा, तशा झालेल्या आभासाचा किंवा विवर्तरूप अध्यारोपाचा अपवाद - निरास, होऊन जीवात्मा आणि परमात्मा यांचे सामान्याधिकरण (एकरूपतेचा निश्चय) होते. या मंत्राच्या अर्थाचे अनुसंधान जपाच्या वेळी करावे. एकदा सांगून ज्ञान झाले नाही तर त्याची वरचेवर आवृत्ती करावी (*आवृत्तिरसकृदुपदेशात्।*) या न्यायानुसार (ब्र.सूत्र ४:१:१) साक्षात्कार होईपर्यंत वरचेवर जप करीत राहावे.

**म**कार म्हणजे मन आणि **त्र**कार म्हणजे त्राण किंवा राखण. यांच्या संयोगाने **मन्त्र** हा शब्द झाला. मनाचे रक्षण करतो तो मंत्र. **ज** म्हणजे जन्मविच्छेद आणि **प** म्हणजे पापनाश यांच्या संयोगाने **जप** शब्द होतो. जन्ममरणांचा छेद करून पापाचा नाश करतो तो जप असा याचा अर्थ.१०४. सर्व यज्ञांत भगवंतांनी हा जपयज्ञच उत्तम मानला आहे (*यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।* भ.गीता १०:२५). हा यज्ञसुद्धा न केला तर तुलनेने कमी सुखाचा हा मानवलोकही मिळणे अशक्य आहे. मग इतर लोकांचा तर विचारच नको. (*नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम।* भ.गीता ४:३१) मोठ्याने उच्चार करून म्हटलेला जप निकृष्ट होय. जीभ किंवा ओठही न हलता केलेला मानसिक जप उत्तम होय. उच्चार न करता पण जीभेची/ओठांची हालचाल करून केलेला रहस्य (*उपांशु*) जप मध्यम जाणावा.१०५.

**शाखारेखाशङ्खमणि-प्रवालस्फटिकैर्जपे । मुक्तापद्माक्षीस्वर्णाक्षैर् दशोत्तरगुणं फलम् ।।१०६।।**
**प्रोक्षिता स्रक् सती मेरु-लङ्घने स्रक्च्युतौ जपे । तन्द्र्यादौ च जपाच्छुद्धिर् देवीं नासाग्रदृग्जपेत् ।।१०७।।**
**यतिर्जपेत्षडोङ्कारां सहस्रं चाष्टयुक्शतम् । अन्योऽष्टाविंशतिं पङ्क्तिं नार्थार्थं तां जपेद् द्विजः ।।१०८।।**
**मैत्रैः सौरैरुपस्थाय वारुणैश्च क्रमात्सदा । जातवेदसे तच्छंयोस् त्रिर्नमो ब्रह्मणे इति ।।१०९।।**

जपे शाखा+रेखा+शंख+मणि+प्रवाल+स्फटिकैः मुक्ता+पद्माक्षी+ स्वर्ण+अक्षैः दश+उत्तर+गुणं फलम्।१०६। स्रक् प्रोक्षिता सती। जपे मेरु+लङ्घने, स्रक् च्युतौ, तन्द्री+आदौ च जपात् शुद्धिः। देवीं नास+अग्र+दृक् जपेत्।१०७। यतिः षट्+ओंकारां सहस्रं जपेत्। अन्यः अष्ट+युक् शतं, अष्टाविंशतिं, पङ्क्तिं (जपेत्)। द्विजः तां अर्थ+अर्थं न जपेत्।१०८। मैत्रैः सौरैः वारुणैः च क्रमात् उपस्थाय, सदा जातवेदसे, तच्छंयोः त्रिः नमो ब्रह्मणे इति।१०९।

बोटांनी, बोटांच्या पेरांनी किंवा शंख, मणी, प्रवाळ, स्फटिक, मोती, पद्माक्षी, सोन्याचे मणी आणि रुद्राक्ष यांच्या माळांनी जप करावा. हे सर्व एकाहून एक दसपट अधिक फळ देतात. म्हणजे बोटांच्या जपाच्या दसपट पेरांनी जप केल्याचे फळ, त्याच्या दसपट शंखांच्या माळेने केलेल्या जपाचे फळ इत्यादि. माळा १०८ मण्यांच्या असाव्या. स्त्रियांना - विशेषतः सुवासिनींना रुद्राक्ष व तुळशीच्या माळा निषिद्ध आहेत.१०६. माळ प्रोक्षण करून घेतलेली चांगली. जप करताना माळ पडली, मेरुमणी ओलांडला किंवा झोप आली तर दोष सांगितला आहे. त्याची अधिक जपाने (किमान एक माळ) शुद्धी होते. गायत्रीचा जप करताना दृष्टी नासिकेच्या अग्रावर (मुळावर? आज्ञाचक्रावर) ठेवावी.१०७. यति शब्दाने इथे बहूदक आणि कुटीचक संन्यासी अभिप्रेत आहेत. त्यांनी सहा ओंकारयुक्त गायत्री मंत्राचा एक हजार जप करावा. ब्रह्मचारी, गृहस्थ आणि वानप्रस्थ यांनी एकशे आठ जप करावा. अशक्त असेल तर किंवा अडचणीच्या वेळी अठ्ठावीस अथवा दहा जप केला तर चालेल. द्विजांनी पैशासाठी गायत्री जप करू नये.१०८. जपानंतर प्रातःकाली मित्रदेवतात्मक *'मित्रस्य चर्षणी धृतो,'* माध्याह्नी सूर्यदेवतात्मक *'उदुत्यं जातवेदसे'* आणि सायंकाळी वरुणदेवातात्मक *'तत्त्वायामि'* या मंत्रांनी उपस्थान करावे. तिन्ही काळी *'जातवेदसे', 'तच्छयोः'* यांनी उपस्थान करून आणि *'नमो ब्रह्मणे'* या मंत्रांचे तीन वेळा पठण करावे.१०९.

**प्रणम्य दिक्तत्पदेव-विप्रान्सन्ध्यां विसृज्य च । गुरुं निषण्णं प्रागास्यं संमुखोऽत्राभिवादयेत् ।।११०।।**
**कराभ्यां यथावामान्य-कर्णौ स्पृष्ट्वा पदौ गुरोः । व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरोऽङ्घ्र्योर्न्यसेत्तदभिवादनम् ।।१११।।**
**हृद्दृग्वाक्पत्कोरुवक्षः-करैर्देवान्नमेद्वरान् । ज्ञानल्पानपि सद्विप्रान् पाणिभ्यान्नाशुचीन्नमेत् ।।११२।।**
**कर्मस्थाग्न्यादिहस्तान्तद्वत्स्वयं चाल्पकान्करात् । उद्वाहोर्ध्वं चरेत्सायं प्रातरौपासनं स्वयम् ।।११३।।**

दिक्+तत्+प+देव+विप्रान् प्रणम्य, सन्ध्यां विसृज्य च प्राक्+आस्यं गुरुं संमुखः अत्र अभिवादयेत्।११०। कराभ्यां यथा+वाम+अन्य+कर्णौ स्पृष्ट्वा, गुरोः पदौ व्यस्ताभ्यां स्पृष्ट्वा शिरः अङ्घ्र्योः न्यसेत् तत् अभिवादनम्।१११। हृत्+दृक्+वाक्+पत्+क+उरु+वक्षः+करैः देवान् नमेत्। वरान्, अल्पान् अपि ज्ञान्, सत्+विप्रान् पाणिभ्यां नमेत्।११२। अशुचीन्, कर्मस्थान्, अग्निहस्तान्, तद्वत् स्वयं न (नमेत्)। अल्पकान् करात् (नमेत्)। उद्वाह+ऊर्ध्वं स्वयं सायं प्रातः औपासनं चरेत्।११३।

प्राच्यादि दिशा, त्यांचे इंद्रादि दिक्पाल आणि सर्व ब्राह्मणांना प्रणाम करून '*उत्तमे शिखरे*' मंत्राने संध्येच्या विसर्जनानंतर पूर्वाभिमुख बसलेल्या गुरूंना सामोरे जाऊन किंवा इतर वेळीही अभिवादन करावे.११०.

अभिवादन कसे करावे ते सांगतात. आपल्या डाव्या हाताने डाव्या कानाला आणि उजव्या हाताने उजव्या कानाला स्पर्श करून, उजवा हात डाव्या हातावरून गुरूंच्या उजव्या पायाला लावावा व डावा हात डाव्या पायाला लावावा आणि मग आपले मस्तक त्यांच्या पायांवर ठेवावे.१११. देवांना मन, दृष्टी, वाणी, पाय, शिर, मांड्या आणि हात ही आठ अंगे जमिनीला टेकून साष्टांग नमस्कार करावा. आपल्यापेक्षा मोठे, वयानेही लहान असलेले ज्ञानी, सात्त्विक ब्राह्मण यांना दोन्ही हात जोडून नमस्कार करावा.११२. सूतकी इत्यादि अशुद्धांना, कर्म करीत असणारा, अग्नी किंवा समिधा हातात असलेल्यांना, तसेच स्वतः अशुची, कर्मांत किंवा अग्निधारी असल्यास, नमस्कार करू नये. शूद्रादि हीनांना एका हाताने नमस्कार करावा.११३.

**पत्नी वान्यतराग्रेऽन्यश् चेद्धमन्या प्रबोध्य तम् । प्रादुष्कृताग्निं ध्यात्वालङ्कृत्य संस्कृत्य हौम्यकम् ।।११४।।**
**ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः सूर्याय चाग्नये । सायं तूष्णीं तूभयत्र द्वितीयां जुहुयात्ततः ।।११५।।**
**उपतिष्ठेत्स्वर्चिताग्निः सूर्याग्निमनुभिः क्रमात् । कायाभ्यां तूभयत्रात्र षष्टिधान्यमिताहुतिः ।।११६।।**

पत्नी वा अन्यः चेत् अन्यतर+अग्रे। तं धमन्या प्रबोध्य प्रादुष्कृत+अग्निं ध्यात्वा अलङ्कृत्य, हौम्यकं संस्कृत्य।११४। ज्वालायां समिधं हुत्वा प्रातः 'सूर्याय', सायं 'अग्नये', तूष्णीं ('प्रजापतये' इति) द्वितीयां जुहुयात्।११५। सु+अर्चित+अग्निः उपतिष्ठेत् क्रमात् सूर्य+अग्नि+मन्त्रैः उभयत्र कायाभ्यां उपतिष्ठेत्। अत्र षष्टि+धान्य+मिता आहुतिः।११६।

**अग्नीची उपासना -** विवाहानंतर रोज सकाळी व सायंकाळी अग्नीची उपासना करावी. किंवा पत्नीने करावी. आश्वलायन गृह्य सूत्रांत (१:९:१-२) दिल्याप्रमाणे पुत्र, कुमारी, अन्तेवासी किंवा नित्य अनुग्रहीत यांनी केल्यास ते स्वतः किंवा पत्नीच्या समोर करावे. वेळूच्या फुंकणीने अग्नी प्रज्वलित करावा. मुखाने करू नये. प्रज्वलन सूर्योदयाच्या पूर्वी किंवा सूर्यास्ताच्या पूर्वी करावे. यात विलंब झाला तर व्याहृतिहोम करून श्रुत्युक्त प्रायश्चित्त घ्यावे. प्रज्वलित अग्नीचे ध्यान करावे. परिसमूहन आणि परिस्तरण करून अग्नीला अलंकारावे. मग होमद्रव्यावर संस्कार करावा.११४. प्रातःकाळी (सूर्योदयापासून संगवापर्यंत) '*सूर्याय इदं न मम*' या मंत्राने व रात्री (सूर्यास्तापासून दहा घटकापर्यंत) '*अग्नय इदं न मम*' या मंत्राने अग्नीच्या ज्वालांत समिधांची आहुती घालावी. दोन्ही वेळा मंत्र मनातच म्हणावा. नंतर '*प्रजापतय इदं न मम*' या मंत्राने दुसरी आहुती द्यावी.११५.

परिस्तरणाचे विसर्जन करून परिसमूहादिकांनी अग्नीची पूजा करून मग सकाळी सूर्य आणि सायंकाळी अग्नीच्या मंत्रांनी व दोन्ही वेळा प्रजापतीच्या मंत्रांनी, '*हिरण्यगर्भःप्रजापत*' (शुक्ल यजुर्वेद २३:१:१, २३:६५:१) उपस्थान करावे. या स्थानी साठ साळींची आहुती द्यावी. शंभर तांदूळांचा प्रस्थ किंवा चौसष्ट अंशांची आहुती द्यावी. उशीर झाल्यास चौपट तुपाने व्याहृतिहोम करावा. संकटकाळी सम होमाचा किंवा तीन पक्षांनी पक्षहोमाचे पर्याय अवलंबावेत.११६.

**पयोदध्याज्यनीवार-यवव्रीह्यादि हौम्यकम् । गृह्यं परिचरेच्छ्रौताग्नीन्वापि ज्ञाततद्वृषः ।।११७।।**
**नातीयाद्ब्राह्मणो यज्ञान् नित्यमासिकवार्षिकान् । नाहोतीयाद्विना दानं शक्त्या दद्यात् किमप्युत ।।११८।।**
**भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्सर्वदाऽसकृत् । संस्कृते साररे च्छन्ने स्वे गृहे निवसेद्गृहि।।११९।।**
**भूः पूताप्युपलिप्ता चेत् पुनर्लेपेन शुद्ध्यति। तन्नित्यं वास्तूपलिम्पेत् प्रेताद्योऽलिप्तकेऽस्ति हि ।।१२०।।**

पयः+दधि+आज्य+नीवार+यव+व्रीहि आदि हौम्यकम्। गृह्यं परिचरेत्। श्रौत+अग्नीन् वा अपि ज्ञात+तत्+वृषः।११७। ब्राह्मणः नित्य+मासिक+वार्षिकान् यज्ञान् न अतीयात्। विना दानं न आहोतीयात्। शक्त्या किं अपि उत दद्यात्।११८। सर्वदा असकृत् भगवन्तं हरिं विष्णुं संस्मरेत्। गृही संस्कृते स+अररे छन्ने गृहे निवसेत्।११९। भूः पूता अपि उपलिप्ता चेत् पुनः+लेपेन शुद्ध्यति। तत् वास्तुं नित्यं उपलिम्पेत्। अलिप्तके प्रेताद्याः अस्ति हि।१२०।

दूध, दही, तूप, देवसाळ, जवसाळ, तादूळ ही हवनीय द्रव्ये आहेत. अशा प्रकारे गृह्य अग्नीची किंवा त्याचे विधिविधान जाणून श्रौत अग्नीची परिचर्या करावी. ईशावास्यातील (११,१२) '*विद्यां चाविद्यां*' या प्रतिपादनानुसार कर्माविषयी ज्ञानाच्या अभावांत अनिष्टाची संभावना असते.११७. ब्राह्मणानी नित्याचे पाच महायज्ञ, तसेच दर्श, आग्रयण इत्यादि मासिक व वार्षिक यज्ञ चुकवू नयेत. तसेच दानाशिवाय होम करू नये. शक्त्यनुसार कांही थोडे तरी द्यावेच.११८.

वर सांगितलेल्या '*यस्य स्मृत्या*'... '*प्रमादं कुर्वतां*' या स्मृतिवचनांप्रमाणे कर्मातील न्यूनता दूर करण्यासाठी वारंवार भगवान विष्णूंचे स्मरण करावे. गृहस्थाने वास्तुशांत्यादींनी संस्कारलेल्या, भिंतीनी व छताने आच्छादलेल्या, कपाटांनी युक्त अशा आपल्या स्वतःच्या घरात राहावे. कपाटांनी रहित, नीट न झाकलेले आणि ज्या घरांत बली आणि भोजन दिले जात नाही त्यांत प्रवेशही करू नये. ते संकटांचे आगर असते. '*अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं। गृहं न प्रविशेद्धीमानापदामाकरो हि सः।।*' (निर्णयसिंधू.)११९. महागरुडपुराणांत (प्रेतखंड, धर्मकांड २:१०) सांगितल्याप्रमाणे भूमी सर्वत्र पवित्रच असली तरी एकदां सारविलेली जमीन पुन्हा सारवल्याने शुद्ध होते. (*सर्वत्र वसुधा पूता यत्र लेपो न विद्यते। यत्र लेपो भवेत्तत्र पुनर्लेपेन शुद्ध्यति।।*'). यासाठी जमीन रोज सारवावी. न सारवलेल्या जमिनीवर भूतप्रेतादिकांचा वावर असतोच.१२०.

**कांस्यांशुकेऽत्र गर्ह्ये गो-विशा नैर्ऋतितो गृहम् । उपलिप्य स्वलङ्कार्यं रङ्गवल्ल्यादिनान्वहम् ॥१२१॥**
**स्थाप्यं गव्यं तिलाश्चर्म मणिश्रीखण्डधेनवः । त्रिसन्ध्येऽर्च्योऽमरः प्रातर्विस्तराच्चन्दनादिना ॥१२२॥**
**मध्याह्ने निशिदीपैर्वा गोवज्जन्मान्यथा द्विज । गुर्वर्काग्न्यम्ब्वष्टधार्चा गोविप्रान्यतमार्चनम् ॥१२३॥**
**कुर्यात्तिष्येऽजसामीप्यं शालिग्रामे तमप्युत । गुर्वाज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्स प्रसीदति ॥१२४॥**
**देवो भक्ततपोयोगादृच्छत्यर्चनगौरवात् । बिम्बाभिरूप्यात्सामीप्यं भक्तिरेवात्र कारणम् ॥१२५॥**

अत्र कांस्य+अंशुके गर्ह्ये। गो+विशा नैर्ऋतितो गृहं उपलिप्य रंग+वल्ल्यादिना अन्वहं सु+अलङ्कार्यम्।१२१। गव्यं तिलाः चर्म मणि+श्रीखंड+धेनवः स्थाप्यम्। त्रिसन्ध्ये अमरः अर्च्यः। प्रातः विस्तरात्।१२२। मध्याह्ने चन्दनादिना, निशि दीपैः वा। (हे) द्विज, अन्यथा जन्म गोवत्। गुरु+अर्क+अग्नि+अम्बु+अष्टधा +अर्चा गो+विप्र+अन्यतम अर्चनम्।१२३। तिष्ये शालिग्रामे अज+सामीप्यम्। तं अपि उत गुरु+आज्ञया भक्तिमान्यं पूजयेत्। सः प्रसीदति।१२४। देवः भक्त+तपो+योगात्, अर्चन+गौरवात्, बिम्ब+आभिरूप्यात् सामीप्यं ऋच्छति। अत्र भक्तिः एव कारणम्।१२५।

सारवतांना कांशाचे भांडे किंवा वस्त्र ही निषिद्ध आहेत. गाईच्या शेणाने नैर्ऋत्य कोपऱ्यापासून सुरुवात करून घर सारवावे. नंतर ते रोज रांगोळ्यांनी वगैरे चांगले सजवावे.१२१. **देवपूजा -** घरात दूध-दुभते, तीळ, मृगाजिन, शाळिग्राम, चंदनाचे खोड आणि दुभती गाय ठेवावेत. त्रिकाळ देवपूजा करावी. सकाळी सविस्तर पूजा करावी.१२२. माध्याह्नी चंदनादींनी पंचोपचार पूजा व रात्री आरती करावी. अन्यथा हा जन्म पशुवत् जाणावा. गुरू, सूर्य, गृह्याग्नी, तीर्थादि जल, शास्त्राभिमत देवतांच्या आठ प्रकारच्या मूर्ती (काष्ठ, पाषाण, सुवर्णादि धातु, वालुका, मृत्तिका, चित्र, रत्नमणी, मनोमयी), गाय, वेदज्ञ ब्राह्मण यांपैकी एकाची पूजा करावी.१२३. कलियुगात शाळिग्रामात विष्णूचा वास असतो, त्याचीही पूजा करावी. गुरूंची आज्ञा घेऊन भक्तिभावाने पूजा केल्याने देव प्रसन्न होतो.१२४. भक्ताच्या तपोरूपी योगाने, अर्चनाच्या विपुलतेने आणि प्रतिमेच्या सौंदर्याने देव सामीप्य प्रदान करतो. यांत सर्वातही भक्ती हेच कारण आहे.१२५.

**नाश्रद्धधानोऽधिकारी संशयात्मात्र नास्तिकः । येभ्यो मातेति पुंगन्धं निवार्यादाय चाखिलान् ।।१२६।।**
**संभारानुपविश्याग्रे देवस्याप्पूरितं घटम् । दक्षभागे निधायाब्जं प्रपूज्य प्रोक्ष्य तत्स्थलम् ।।१२७।।**
**स्वं संभारांश्च भूभूत-शुद्धिं कृत्वा यथायथम् । प्राणान्प्रतिष्ठाप्य चान्तर् बहिर्मातृकया न्यसेत् ।।१२८।।**
**तनौ देवेऽपि पूंसूक्त-मन्त्रैश्चापि यथाक्रमम् । कराङ्घ्र्यूरुकटीनाभि-हृद्ग्रीवादोर्मुखाक्षिके ।।१२९।।**

अत्र अश्रद्धधानो संशयात्मा, नास्तिकः अधिकारी न। 'येभ्यो माता' इति पुं+गन्धं निवार्य अखिलान् संभारान् आदाय।१२६। उपविश्य, देवस्य अग्रे दक्षभागे घटं निधाय, अब्जं प्रपूज्य, तत् स्थलं प्रोक्ष्य, प्राणान् प्रतिष्ठाप्य च अन्तः बहिः मातृकया न्यसेत्।१२७-१२८। तनौ देवे अपि पुंसूक्त+मन्त्रैः च अपि यथाक्रमं कर+अङ्घ्रि+ऊरु+कटी+नाभि+हृत्+ग्रीवा+ दोः+मुख+अक्षिके (न्यसेत्)।१२९।

श्रद्धाहीन, संशयग्रस्त आणि नास्तिक यांना देवपूजेचा अधिकार नाही. '*शोकाक्रान्तः कृपाविष्टः श्रद्धया रहितः पुमान्। गुरुदेवद्विजातीनां पूजनं न समाचरेत्।।*' असे शास्त्रवचन आहे. माणसाच्या वासापासून देव दूर जातात त्या दुर्गंधाच्या निवारणासाठी '*येभ्यो माता*' आणि '*एवा पित्रो*' या मंत्रांचा उच्चार करावा. अर्भवाख्यानांत (ऐतरेय ब्राह्मण ३:३:६) मनुष्यगंधाला उबगून देवता अंतर्धान पावल्याचे सांगितले आहे. १२६. पूजेची सर्व सामग्री जमवून देवासमोर बसावे. देवाच्या उजव्या बाजूला पाण्याने भरलेला कलश ठेवावा. मग शंखाची पूजा करून त्यातील पाणी, पूजेची जागा, आपण स्वतः आणि पूजाद्रव्यांवर प्रोक्षण करावे. नंतर भूमी आणि भूत यांची शुद्धी करून अंतर्मातृका आणि बहिर्मातृका यांनी न्यास करावेत.१२७-१२८. तसेच स्वतःच्या शरीरावर आणि देवाच्या मूर्तीवर पुरुषसूक्तमंत्रांनी अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या मंत्रांनी हात, तिसऱ्या व चौथ्या मंत्रांनी पाय, पाचव्या व सहाव्या मंत्रांनी मांड्या, सातव्या व आठव्या मंत्रांनी कटीचे दोन्ही भाग, नवव्या मंत्राने नाभी, दहाव्या मंत्राने हृदय, अकराव्याने कंठ, बाराव्या व तेराव्या मंत्रांनी बाहू, चौदाव्या मंत्राने मुख, पंधराव्याने डोळे आणि सोळाव्या मंत्राने शीर असे न्यास करावेत. मागे सांगितल्याप्रमाणे अंगांचे न्यास करताना डावीकडून क्रम ठेवावा.१२९.

**एवं भूत्वा सुरोऽर्घ्यादि-पात्राण्यप्पूरितानि च । संस्थाप्येशकलां हृत्स्थाम् आपादतलमस्तकम् ।।१३०।।**
**ध्यात्वाञ्जलौ सुमगतां विभाव्यार्चागतां ततः । प्रकल्प्यार्चां देवरूपां साक्षान्मत्वा ततोऽर्चयेत् ।।१३१।।**
**सम्पूज्य पीठद्वाराशा मन्त्रतन्त्रविधानतः । पुंमन्त्रैर्वाह्वानपीठ-पाद्यार्घ्याचमनाप्लवान् ।।१३२।।**
**वस्त्रे सूत्रे गन्धपुष्पे धूपदीपाशनादिकम् । नतिप्रदक्षिणापुष्पाञ्जलीन्भक्त्याऽर्पयेत्क्रमात् ।।१३३।।**

एवं सुरः भूत्वा अप्+पूरितानि अर्घ्यादि पात्राणि च संस्थाप्य हृत्+स्थां आपाद+तल+मस्तकं ध्यात्वा अञ्जलौ सुमगतं विभाव्य ततः अर्चा+गतं प्रकल्प्य अर्चां साक्षात् देवरूपं मत्वा ततः अर्चयेत्।१३०-१३१। मन्त्र+तन्त्र+विधानतः पीठ+द्वार आशा सम्पूज्य पुं+मन्त्रैः आह्वान+पीठ+पाद्य+अर्घ्य+आचमन+आप्लवान्।१३२। वस्त्रे, सूत्रे, गन्ध+पुष्पे धूप+दीप+अशन+आदिकं नति+प्रदक्षिणा+पुष्पाञ्जलीन् भक्त्या क्रमात् अर्पयेत्।१३३।

आह्निककारिकेच्या '*देवो भूत्वा यजेद्देवम्*' या वचनानुसार या न्यासांनी देवरूप होऊन पाण्याने भरलेली पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान यांची भांडी आपापल्या जागी ठेवावी. हृदयस्थ ईश्वरकला (जीवात्मा) हीच गुरूपदिष्ट मूर्ती असे जाणून ती आपादमस्तक ध्यानात आणावी. तीच श्वासमार्गाने ओंजळीतील घेतलेल्या पुष्पांत गेली अशी भावना करावी. नंतर तीच फुले देवाला वाहून त्या फुलांतून ती देवाच्या मूर्तीत संक्रमित झाली अशी भावना करावी. मग ती मूर्ती साक्षात् देवतारूप असे मानून पूजा करावी.१३०-१३१. मंत्र आणि तंत्रविधानानुसार पीठद्वार आणि दिशा यांच्यासहित प्रतिमेचे पूजन करावे. किंवा पुरुषसूक्ताच्या मंत्रांनी क्रमशः आवाहन (*सहस्र..*), आसन (*पुरुष..*), अर्घ्य (*त्रिपादू..*), आचमन (*तस्माद्वि..*), स्नान (*यत्पुरुष..*), वस्त्रे (*तं यज्ञं..*), यज्ञोपवीत (*तस्माद्य..*), गंध (*तस्माद्य..*), पुष्पे (*तस्मादश्वा..*), धूप (*यत्पुरु..*), दीप (*ब्राह्मणो..*), नैवेद्य (*चंद्रमा..*), नमस्कार (*नाभ्या आ..*), प्रदक्षिणा (*सप्तास्या..*) आणि पुष्पांजली (*यज्ञेन..*) हे सोळा उपचार भक्तिपूर्वक समर्पण करावेत.१३२-१३३.

**(क्षेपकः) यजेत्पौराणिकैर्मन्त्रैः स्त्रीः शूद्रश्च द्विजोदितैः ।**
**संभवे सत्याप्लवादौ दद्यात्पञ्चामृतानि च । भूषाः सुभोगा गन्धोर्ध्वमशनेऽन्नं चतुर्विधम् ।।१३४।।**
**राजोपचारताम्बूल-दक्षिणारार्तिकैः फलैः । स्तोत्रैर्गीतैर्नृत्यवाद्यैस्तोषयेद् द्विजभोजनैः ।।१३५।।**
**घण्टानादं चरेदादौ स्नाने धूपप्रदीपयोः । दद्यादाचमनं स्नाने नैवेद्ये वस्त्रसूत्रयोः ।।१३६।।**
**जलं प्रत्युपचारं च शङ्खांब्वीशं विनाप्लुतौ । स्वारामारण्यक्रयाप्तं पुष्पं सन्मध्यमं त्वसत् ।।१३७।।**
**तद्वच्छ्वेतारक्तकृष्णं वर्ज्यं पर्युषितं सुमम् । सच्छिद्रं जन्तुयुक् शीर्णं कीटाद्यात्तं स्वयं च्युतम् ।।१३८।।**

स्त्रीः शूद्रः च द्विज+उदितैः पौराणिकैः मन्त्रैः यजेत्।क्षेपकः। संभवे सति, आप्लव आदौ पञ्चामृतानी, गन्ध+ऊर्ध्वं भूषा, सुभोगाः, अशने चतुर्विध अन्नं च दद्यात्।१३४। राज+उपचार+ताम्बूल+दक्षिणा+आरार्तिकैः फलैः स्तोत्रैः गीतैः नृत्य+वाद्यैः द्विज+भोजनैः तोषयेत्।१३५। स्नाने, धूप+प्रदीपयोः आदौ घण्टानादं चरेत्। स्नाने, नैवेद्ये, वस्त्र+सूत्रयोः आचमनं दद्यात्।१३६। प्रति+उपचारं जलं, ईशं विना आप्लुतौ शङ्ख +अम्बु (दद्यात्)। स्व+आराम+अरण्य+क्रय+आप्तं पुष्पं सन्, मध्यमं तु असत्।१३७। तत्+वत् श्वेत+आरक्त+कृष्णं (पुष्पम्)। पर्युषितं सच्छिद्रं, जन्तुयुक्, शीर्णं, कीट+आदि+आत्तं स्वयं च्युतं सुमं वर्ज्यम्।१३८।

भक्तिमान् स्त्रिया आणि शूद्रांनी ब्राह्मण पुरोहिताने सांगितलेल्या पौराणिक मंत्रांनीच पूजा करावी; वैदिक मंत्रांनी करू नये (क्षेपक). शक्य झाल्यास अभिषेकापूर्वी पंचामृतस्नान, गंधानंतर अलंकार, चांगले भोग, नैवेद्यांत चतुर्विध अन्न हे उपचारही अर्पण करावे.१३४. पूजेच्या आरंभी, स्नानाच्या वेळी, धूप आणि दीप दाखविताना घंटानाद करावा. तसेच स्नान, नैवेद्य, वस्त्रे आणि यज्ञोपवीत अर्पणानंतर आचमन द्यावे.१३५. राजोपचार, तांबूल, दक्षिणा, आरती, फळे, स्तोत्रपठण, गायन, नृत्य, वाद्य तसेच ब्राह्मणभोजनाने देवाला तुष्टवावे.१३६. प्रत्येक उपचारानंतर पाणी द्यावे. शिव सोडून इतर देवांना अभिषेकानंतर शंखोदक द्यावे. फले स्वतःच्या बागेतील उत्तम, अरण्यातील मध्यम आणि विकतची कनिष्ठ जाणावीत.१३७. त्याचप्रमाणे श्वेत पुष्प उत्तम, लाल मध्यम आणि काळे वाईट जाणावे. शिळी, भोके पडलेली, जन्तुयुक्त, फाटकी, किडे वगैरेनी खाल्लेली, आपोआप पडलेली फुले देवाला वर्ज्य आहेत.१३८.

**समलं वामहस्ताङ्घ्रि-स्पृष्टं क्षालितमम्बुनि । बकुलाब्जाशोकजाती-दूर्वाबिल्वं शमी कुशः ।।१३९।।**
**तुलसी करवीरं च मल्लिकाशोकमुत्तमम् । कोविदारार्कधत्तूर-शाल्मलीकुटजैर्हरिः ।।१४०।।**
**नार्च्यो गणेशस्तुलस्या दूर्वयार्येश्वरोऽसितैः । रक्तैः केतकनिम्बाद्यैर् बिल्वं श्वेतसुमं प्रियम् ।।१४१।।**
**दूर्वा गणेशस्य विष्णोस् तुलसीत्यादि सर्वशः । ज्ञात्वा पुष्पाणि देयानि श्रद्धया देवतुष्टये ।।१४२।।**
**हुत्वा पुंसूक्तेन दत्वा पुष्पाणि प्रार्थयेद्धरिः । मन्त्रं जपेद्यथाशक्ति भक्त्या तद्गतहृद्द्विजः ।।१४३।।**

समलं, वाम+हस्त+अङ्घ्रि+स्पृष्टं, अम्बुनि क्षालितं (पुष्पं वर्ज्यम्)। बकुल, अब्ज, अशोक, जाती, दूर्वा, बिल्वं, शमी, कुशः, तुलसी, करवीरं च मल्लिका, अशोकं उत्तमम्। कोविदार, अर्क धत्तूर, शाल्मली, कुटजैः हरिः न अर्च्यः।१३९-१४०। गणेशः तुलस्या, आर्या दूर्वया, ईश्वरः असितैः रक्तैः केतक-निम्बाद्यैः न अर्चयेत्। बिल्वं श्वेतसुमं प्रियम्।१४१। गणेशस्य दूर्वा, विष्णोः तुलसी इत्यादि सर्वशः पुष्पाणि ज्ञात्वा श्रद्धया देवतुष्टये देयानि।१४२। पुंसूक्तेन हुत्वा, पुष्पाणि दत्वा हरिः प्रार्थयेत्। द्विजः भक्त्या तद्+गत+हृत् यथाशक्ति मन्त्रं जपेत्।१४३।

मळ चिकटलेले, डाव्या हाताचा किंवा पायाचा स्पर्श झालेले पाण्यात धुतलेले फूलही वर्ज्य आहे. बकुळी, कमळ, अशोक, चमेली, दूर्वा, बेलपत्र, शमीपत्र, कुश,(१३९) तुळस, कण्हेर, मोगरा, अशोक ही उत्तम फुले होत. कांचन, रुई, धोतरा, सेमल, कुडा ही फले विष्णूला वाहू नयेत.१४०. गणपतीला तुळस, देवीला दूर्वा आणि शिवाला काळी व लाल फुले, तसेच केवडा, निम्ब इत्यादि फुले वाहू नयेत. शंकराला बिल्वपत्र आणि पांढरी फुले प्रिय आहेत.१४१. गणपतीला दूर्वा, विष्णूला तुळस इत्यादि सर्व फुले जाणून देवाला संतुष्ट करण्यासाठी श्रद्धापूर्वक अर्पण करावीत.१४२. नैवेद्यानंतर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेने चरु किंवा तूप यांची आहुती द्यावी त्याच मंत्रांनी देवाला फुले वाहावीत आणि हरीची सूक्ताने किंवा स्तोत्राने प्रार्थना करावी. नंतर त्रैवर्णिकांनी एकचित्ताने भक्तीने यथाशक्ती गुरूंनी उपदेशिलेल्या मंत्राचा जप करावा. शूद्रांनी ब्राह्मणाने सांगितलेल्या पौराणिक मंत्रानीच पूजा करावी. नामसंकीर्तन, स्मरण आणि श्रवण यांचा सर्वांनाच अधिकार आहे.१४३.

**द्विजदेवाङ्घ्र्यब्जतीर्थं पेयं धार्यं च मूर्धनि । चतुर्धाध्ययनं कुर्यात्स्ववृत्त्या पोष्यपोषणम् ।।१४४।।**
**स्ववृत्त्या जीवनाभावाद् गुर्वापद्यन्यवार्तया । जीवेतानिन्द्यया नैव हीनवृत्त्या कुटुम्ब्यपि ।।१४५।।**

द्विज+देव+अङ्घ्रि+अब्ज+तीर्थं पेयं मूर्धनि च धार्यम्। चतुर्धा अध्ययनं कुर्यात्। स्व+वृत्त्या पोष्यपोषणं (कुर्यात्)।१४४। स्ववृत्त्या जीवन+अभावात् गुरु+आपदि अनिन्द्यया अन्यवार्तया जीवेत। कुटुम्बी अपि हीनवृत्त्या न (जीवेत)।१४५।

प्रथम ब्राह्मणाचे व नंतर देवाचे चरणतीर्थ घेऊन मस्तकावर शिंपडावे. अध्ययन, अध्यापन, त्याच्या अर्थाचे चिंतन आणि प्रवचन असे चार प्रकारचे अध्ययन करावे. आपल्या वर्णानुसार विहित असलेल्या वृत्तीने अग्नी, गाय, अतिथी, आईवडील, पुत्र, भार्या इत्यादि पोष्यांचे पोषण करावे.१४४.

आपल्या विहित वृत्तीने उपजीविका होत नसेल तर दुसऱ्या चांगल्या वृत्तीचा अवलंब करावा. गृहस्थानेसुद्धा हीनवृत्तीचा आश्रय करू नये. ब्राह्मणाची मुख्य वृत्ती प्रतिग्रह (दान घेणे) आहे. ती अशक्य असल्यास अध्यापन आणि याजन (भिक्षुक, पौरोहित्य) किंवा अयाचित, यायावर, शिल आणि उञ्छ या वृत्ती शास्त्रसंमत आहेत. यायावर म्हणजे रोजच्या रोज धान्याची भिक्षा मागणे, कुसूल म्हणजे बारा दिवसांपर्यंतचा संग्रह करणे. कुम्भि म्हणजे सहा दिवसांचा संग्रह करणे. तीन दिवसांचा संग्रह किंवा निदान उद्याचा तरी संग्रह कलियुगांत करावा असे याज्ञवल्क्यस्मृतीत सांगितले आहे (*कुसूलकुम्भिधान्यो वा त्र्याहिकः श्वस्तनोऽपि वा। कलौ द्विजो न हि भवेदश्ववृत्तिः कथंचन।।*). यांपैकी कोणतीच उपजीविका शक्य नसेल तर क्षात्रवृत्तीने किंवा वैश्यवृत्तीने कुटुम्बाचे पोषण करावे. वृद्ध मातापिता, साध्वी भार्या, शिशु पुत्र यांच्या भरणपोषणसाठी करू नये तेही शंभर वेळा करावे असे मनूचे मत आहे (*वृद्धौ मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत्।।*) विविध स्मृतींतून यावर सविस्तर उहापोह केलेला आहे.१४५.

**कृतसन्ध्यः कृतोपस्थो जानुस्थसकुशाञ्जलिः । सोङ्कारव्याहृतिं देवीं रोदसीदत्तदृग्जपेत् ।।१४६।।**
**तां पच्छोऽर्धर्चशः सर्वां वेदान्साङ्गान्स्वशक्तितः । तिष्ठन्नासीनो व्रजन्वानध्यायेऽल्पं जपेत्ततः ।।१४७।।**
**त्रिर्नमो ब्रह्मण इति तर्पयेत्साक्षताञ्जलिः । देवानृषीन् तिलैः पितॄन् स्वगृह्योक्तविधानतः ।।१४८।।**
**यज्ञादिवर्ज्यमाशौचे कर्म मानसिकं चरेत् । यमाग्निपितृभे नन्दा शुक्रार्काहे जनुर्दिने ।।१४९।।**

कृत+सन्ध्यः कृत+उपस्थः जानुस्थ+सकुश+अञ्जलिः स+ओङ्कार+व्याहृतिं पत्+शः अर्ध+ऋचशः सर्वां देवीं रोदसी+दत्त+दृक् जपेत्।१४६। स+अङ्गान् वेदान् स्वशक्तितः तिष्ठन् आसीनः व्रजन् वा, अनध्याये अल्पं, 'त्रिः नमो ब्रह्मणे' इति जपेत्।१४७। स+अक्षत+अञ्जलिः देवान् ऋषीन्, तिलैः पितन् (च) स्व+गृह्य+उक्त+विधानैः तर्पयेत्।१४८। आशौचे यज्ञा+आदि+वर्ज्यं कर्म मानसिकं चरेत्। यम+अग्नि+पितृ+भे नन्दा शुक्र+अर्क+अहे जनुः+दिने,।१४९।

**ब्रह्मयज्ञ -** माध्याह्न संध्या आणि उपस्थान करून डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून ओंजळीत दर्भ घेऊन ती उजव्या गुडघ्यावर ठेवून ॐकार व व्याहृतींसह गायत्रीचा पदशः, अर्धा-अर्धा आणि पूर्ण जप करावा. या वेळी दृष्टी आकाश आणि पृथ्वी यांच्या संधीवर (क्षितिजावर) स्थिर केलेली असावी. यात आश्वलायनसूत्रांत वेगळे विधान सांगितले आहे. उपकर्मात पाण्याच्या कलशांत दर्भ ठेवून ब्रह्माञ्जली करावी असे विधान आहे. स्वशक्त्यनुसार, उठता-बसता किंवा चालताना सर्व वेदांचा पाठ करावा. ज्या दिवशी अनध्याय असेल तेव्हा थोडाच पाठ करावा. मग 'नमो ब्रह्मणे' या मंत्राचे तीन पाठ करावे.१४६-१४७. **पितृतर्पण -** मग आपापल्या गृह्यांत सांगितलेल्या विधानानुसार देव आणि ऋषी यांचे अक्षतांनी आणि पितरांचे तिळांनी तर्पण करावे.१४८. अशौच आले असता यज्ञादि कर्म वर्ज्य आहे. संध्या मानसिक करावी. भरणी (**यम**), कृत्तिका (**अग्नी**) आणि मघा (**पितृ**) या नक्षत्रांना, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या (**नंदा**) तिथींना, आपल्या जन्मदिवशी,(१४९)

**माङ्गल्येऽब्दतदर्धार्धं विवाहव्रतचौलतः । तिलैर्नैमित्तिकमृते तर्पयेन्न गृहे तु न ।।१५०।।**
**भीष्मं माघसिताष्टम्यां दीपाल्यां तर्पयेद्यमम् । नित्यैर्नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत् ।।१५१।।**
**त्रियज्ञाढ्यं वैश्वदेवं कुर्यात्सूनापनुत्तये । ध्याते कुण्डस्थापितेऽग्नौ दीप्तेऽन्नाद्याहुतीर्हुनेत् ।।१५२।।**

माङ्गल्ये विवाह+व्रत+चौलतः अब्द+तत्+अर्ध+अर्धं नैमित्तिकं ऋते तिलैः न तर्पयेत्। गृहे तु (तिलैः) न।१५०। माघ+सित+अष्टम्यां भीष्मं, दीपाल्यां यमं तर्पयेत्। नित्यैः नैमित्तिकैः श्राद्धैः सत्पुत्रः पुत्रतां व्रजेत्।१५१। सूना+अपनुत्तये त्रि+यज्ञ+आढ्यं वैश्वदेवं कुर्यात्। कुण्डे स्थापिते ध्याते अग्नौ अन्नादि आहुतीः हुनेत्।१५२।

मंगलकार्यानंतर, विवाहानंतर एक वर्ष, मुंजीनंतर सहा महिने आणि चौलानंतर तीन महिने तिळांनी तर्पण करू नये. नैमित्तिक तिलतर्पणाला दोष नाही. घरी तिलतर्पण करू नये.१५०. माघ शुद्ध अष्टमीला '*वैयाघ्रपादगोत्राय सांकृत्यप्रवराय च। अपुत्राय ददाम्येतज्जलं भीष्माय तर्पणे*' या मंत्राने भीष्माचे आणि यम, धर्मराज, मृत्यू, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र आणि चित्रगुप्त या नावांनी यमाचे तर्पण करावे. निर्णयसिंधूप्रमाणे ज्याचा पिता जिवंत आहे त्यानीसुद्धा भीष्म आणि यम यांचे तर्पण करावे. अमावास्यादि शहाण्णव नित्य श्राद्धे आणि गयादि तीर्थाला जाऊन केलेल्या नैमित्तिक श्राद्धांच्या अनुष्ठानानेच पुत्राचे पुत्रत्व सार्थ होते. जिवंत असतांना आज्ञा पाळण्याने आणि मृत्यूनंतर दर वर्षी अन्नदानाने आणि गयेला जाऊन पिंडदान यांनीच पुत्राची पुत्र ही संज्ञा सार्थ ठरते (*जीवितो वाक्यकरणात्प्रत्यब्दं भूरिभोजनात्। गयायां पिण्डदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता।।*).१५१.

**वैश्वदेव -** पराशरस्मृतीनुसार उखळ, मुसळ, चूल, रांजण आणि झाडू या पाच सूनांचा दोष गृहस्थाश्रमात लागतो. तो स्वर्गाला जाऊ देत नाही. त्याचा परिहार करून आत्मशुद्धी होण्यासाठी देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ ह्या तीन यज्ञांनी युक्त असा वैश्वदेव करावा. अग्नीत हवन केले जाते तो देवयज्ञ, बली दिला जातो तो भूतयज्ञ, पितरांना दिला जातो तो पितृयज्ञ, स्वाध्यायाचे अध्ययन हा ब्रह्मयज्ञ आणि मनुष्यांना दिला जाणारा मनुष्ययज्ञ अशी पाच महायज्ञाची लक्षणे आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितली आहेत (आश्वलायन गृह्यसूत्र ३:१:३). कुण्डात स्थापन केलेल्या अग्नीचे ध्यान करून त्यात अन्नदिकांच्या आहुती समर्पण कराव्यात.१५२.

**प्रातः सायं बलीन्दद्यात् पितृभ्योऽपि बहिर्बलिम् । भूताद्युद्देशतः क्षिप्त्वा काङ्क्षेदतिथिमागतम् ।।१५३।।**
**कमप्यभ्यर्च्य शक्त्यान्नं देयमीश्वरतुष्टये । साद्यान्ताम्ब्वन्नं यतौ तत् स्वल्पमप्यद्रिसिन्धुवत् ।।१५४।।**
**बलावनुद्धृते नाद्यान्नोद्धरेच्च स्वयं बलिम् । नित्यं श्राद्धं चरेद्वान्नं दद्यादद्याच्च पोष्ययुक् ।।१५५।।**
**मन्त्रवत्परिषिच्यार्द्र-हस्ताङ्घ्र्यास्योऽविदिङ्मुखः । दक्षभागे बलीन्दत्वाऽहं वैश्वानर इत्यमुम् ।।१५६।।**
**स्मृत्वापो मन्त्रवत्प्राश्य हुतप्राणाहुतीर्ग्रसेत् । धृतपात्रः प्राणमन्त्रैरजावद्भोजनं चरेत् ।।१५७।।**

प्रातः सायं पितृभ्यः बलीन् दद्यात्। भूतादि उद्देशतः अपि बहिः बलीन् क्षिप्त्वा अतिथिं काङ्क्षेत्।१५३। कं अपि आगतं अभ्यर्च्य ईश्वर+तुष्टये शक्त्या अन्नं दद्यात्। यतौ स+आद्य+अंत+अम्बु+अन्नं तत् स्वल्पं अपि अद्रि+सिन्धु+वत्।१५४। बलौ अनुद्धृते न अद्यात्, स्वयं च बलिं न उद्धरेत्। नित्यं श्राद्धं चरेत्, अन्नं वा दद्यात्। पोष्ययुक् अद्यात्।१५५। मन्त्रवत् परिषिच्य आर्द्र+हस्त+अङ्घ्रि+आस्यः अविदिक्+मुखः दक्षभागे बलीन् दत्वा 'अहं वैश्वानर' इति अमुं स्मृत्वा, मन्त्रवत् प्राश्य, प्राणमन्त्रैः हुत+प्राण+आहुतीः ग्रसेत्। धृतपात्रः अजावत् भोजनं चरेत्।१५६-१५७।

सकाळी व संध्याकाळी बलिहरण करावे. पितरांना बली देऊन भूतादिकांसाठी बाहेर बली टाकावा आणि अतिथीची वाट पाहावी.१५३. त्या समयी जो कोणी मनुष्य येईल त्याची पूजा करून देवाच्या संतोषासाठी त्याला शक्त्यनुसार अन्न द्यावे. भिक्षेला आलेल्या संन्याशाला आधी व नंतर पाण्यासह थोडेही अन्न दिले तर ते पर्वताएवढ्या अन्नाचे आणि समुद्राएवढ्या जलाचे फळ देऊन जाते. यति आणि ब्रह्मचारी हे शिजवलेल्या अन्नाचे धनी आहेत. त्यांना अन्न न देता जेवल्यास चांद्रायण आचरावे. '*यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ। तयोरन्नमदत्वा तु भुक्त्वा चान्द्रायणं चरेत्।।*' (पराशर स्मृति १:४६).१५४. बलिहरणावरील झाकण काढल्यावरच जेवावे. ते स्वतः काढू नये. नित्य श्राद्ध तरी करावे किंवा तन्निमित्त अन्न तरी द्यावे. मग पिता, पुत्र आदि पोष्यांसह भोजन करावे.१५५.

**पात्रधारणमौने तु प्राणाहुत्यूर्ध्वमैच्छिके । तैजसे राजते हैमे ताम्रे जम्ब्वाम्रचम्पके ।।१५८।।**
**रम्भामधूककुटज-पनसोदुम्बरच्छदे । भोक्तव्यं मण्डलोर्ध्वस्थे विधवाव्रतिभिक्षुभिः ।।१५९।।**
**न तैजसेऽखिलैर्वल्ली-पलाशार्कवटादिषु । पीठस्थोऽप्यासनारूढः प्रसृतप्रोष्ठपात्र तु ।।१६०।।**

पात्र+धारण+मौने तु प्राण+आहुति+ऊर्ध्वं ऐच्छिके। मण्डल+ऊर्ध्वस्थे तैजसे, राजते, हैमे, ताम्रे, जम्बु+आम्र+चम्पके रम्भा+मधूक+कुटज+पनस+उदुम्बर+छदे भोक्तव्यम्। विधवा+व्रति+ भिक्षुभिः न तैजसे। अखिलैः वल्ली+पलाश+अर्क+वट+आदिषु (न भोक्तव्यम्)। पीठस्थः आसन+आरूढः प्रसृत+प्रोष्ठ+पात् तु न (भोक्तव्यम्)। १५८-१६०।

**भोजनविधी -** भोजनविधी प्रथम, दिवसां '*सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामि*' आणि रात्री '*ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामि*' या मंत्रांनी अन्नाभोवती पाणी शिंपडावे. नंतर हात, पाय आणि मुख ओले असताना, आग्नेयादि कोणाकडे मुख न करता उजव्या बाजूला आपापल्या उपदेशानुसार '*चित्राय नमः*' इत्यादि मंत्रांनी बली घालावेत. '*अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तं पचाम्यन्नं चतुर्विधम्।।*' (भ.गीता १५:१४) या मंत्राचे अर्थपूर्वक स्मरण करावे. '*वैश्वानरः साधारणशब्दविशेषात्*' या ब्रह्मसूत्रानुसार (१:२:२४) प्रत्यगात्माच होय. त्याचे स्मरण करून, '*अमृतोऽपस्तरणमसि स्वाहा*' या मंत्राने पाणी प्यावे. मग छांदोग्य उपनिषदांत (१:३:३) वर्णन केलेल्या प्राण, अपान आणि व्यान यांच्या स्वरूपाचा विचार करून '*श्रद्धायां निविष्टोऽमृतं जुहोमि शिवोमाविशप्रदाहय*' इत्यादि पाच प्राणमंत्रांनी प्राणाहुती दाताला स्पर्श न होऊ देता गिळाव्यात. मग पात्र धरून ठेवून शेळीसारखे शीघ्र भोजन करावे. प्राणाहुतीपर्यंत पात्र धरून ठेवणे व मौन ही पाळलीच पाहिजेत. नंतर मात्र ती ऐच्छिक आहेत. मंडल (ब्राह्मणांनी चतुष्कोण) करून त्यावर भोजनपात्र ठेवावे. पात्र कांस्य, चांदी, सोने ह्या धातूचे किंवा जांबू, आंबा, चाफा, केळी, महू, कुडा, फणस किंवा औदुंबर यांच्या पत्रावळीवर जेवावे. विधवा, मुंजा आणि संन्यासी यांनी काशाच्या पात्रात जेवू नये. वेली, पळस, रुई, वड इत्यादींची पाने सर्वांनाच वर्ज्य आहेत. पीठावर बसून, स्वस्तिकादि आसन घालून, पाय पसरून किंवा आसनावर पाय ठेवून जेवू नये.१५८-१६०.

**नार्भैर्वध्वोद्वाहमृते नाद्याद्दुष्टैकपङ्क्तिगः । द्वार्भस्माग्न्यप्स्तम्भमार्गैर्-भिन्द्यात्पङ्क्तिं तु संशये ।।१६१।।**
**नाद्यात्पाकाग्निदेवासद्गृहे सन्ध्यातिरात्रिषु । पीतशेषं ग्रासशेषं रात्रिपर्युषितं विना ।।१६२।।**
**तैलाज्यपक्कं शूद्रान्नमुदक्यादिविलोकितम् । केशकीटादियुक्पक्कं व्याद्युच्छिष्टं सदा त्यजेत् ।।१६३।।**
**कुसुम्भालाबुवृन्ताक-कोविदारवटादिकम् । कुस्थानोत्थान्नशाकादि-पलाण्डुलशुनाद्यसत् ।।१६४।।**
**सद्गोलुलायीदुग्धादि सदन्यासां तु गर्हितम् । कांस्येऽसन्नारिकेलेक्षु-रसो गव्यं च ताम्रके ।।१६५।।**

न अर्भैः, उद्वाहम् ऋते वध्वा, न दुष्ट+पङ्क्ति+गः अद्यात्। संशये तु द्वाः+भस्म+अग्नि+स्तम्भ+मार्गैः पङ्क्तिं भिन्द्यात्।१६१। पाक+अग्नि+देव+असत्+गृहे न अद्यात्। सन्ध्या+अतिरात्रिषु (न अद्यात्) पीतशेषं, ग्रासशेषं, विना तैल+आज्य+पक्कं रात्रिपर्युषितं, शूद्रान्नं, उदक्यादि+विलोकितं, केश+कीट+आदि+युक्+पक्कं वि+आदि+उच्छिष्टं सदा त्यजेत्।१६२-१६३। कुसुम्भ+अलाबु+वृन्ताक+कोविदार+वट+आदिकं कुस्थान+उत्थ+शाकादि पलाण्डु+लशुनादि असत्।१६४। सत्+गो+लुलायी+दुग्ध+आदि सत्। अन्यासां तु गर्हितम्। कांस्ये नारिकेल+इक्षु+रसः, ताम्रके गव्यं च असत्।१६५।

मुलांबरोबर एका पात्रात जेवू नये; तसेच पत्नीसहही, लग्नसमारंभाशिवाय एका ताटात जेवू नये. दोषी व्यक्तीच्या पंक्तीत जेवू नये. तसा संशय वाटल्यास दार, भस्म, अग्नी, खांब किंवा मार्ग यांनी पंगत तोडावी.१६१. स्वयंपाकघरात, अग्निशालेत, देवघरात आणि दुष्टघरी जेवू नये. संध्याकाळात, अपरात्री जेवू नये. पिऊन किंवा खाऊन उरलेले, तुपांत किंवा तेलांत तळलेले सोडून रात्रीचे शिळे अन्न, शूद्राचे अन्न, अस्पृश्य स्त्रीने पाहिलेले अन्न, केस, किडे इत्यादींसह शिजवले गेलेले, पक्षी वगैरेनी उष्टावलेले अन्न नेहमीच टाकून द्यावे.१६२-१६३. कुसुंब, भोपळा, वांगी, कांचन, वड इत्यादि, तसेच कुस्थानांत उपजवलेल्या भाज्या, कांदा, लसूण इत्यादि त्याज्य आहेत.१६४. चांगल्या, सवत्सा, चार सडांच्या गाईचे किंवा म्हशीचे दूध चांगले. इतरांचे - गाढवी, उंटीण, मेंढी इत्यादींचे त्याज्य आहे. नारळाचे पाणी आणि ऊसाचा रस काशाच्या भांड्यातून घेऊ नये. तसेच दूध तांब्याच्या पात्रात ठेवू नये.१६५.

**गुडः सदध्यार्द्रकोऽसन् केवलं लवणं त्वसत् । श्वोदक्यापतिताद्यारश्रवणे तद्विलोकने ।।१६६।।**
**भुक्तौ परस्परस्पर्शे नाद्यात्पङ्क्तिस्थ उत्थिते । गुरून्विनोलूखलादेर् नाद्याद्यावद्ध्वनि द्विज ।।१६७।।**
**नष्टे दीपे न भोक्तव्यं न मूत्राद्युत्सृतौ भुजिः । लेह्याद्यसद्धस्तदत्तं नोच्छिष्टं भाजने न्यसेत् ।।१६८।।**
**ग्रसेदास्याविकारेण ग्रासानष्टौ यतिर्वनी । षोडश द्वात्रिंशदन्यो वर्णीष्टं मधुरं द्रवम् ।।१६९।।**
**प्राङ्मध्येऽम्लादिकठिनं तिक्ताद्यन्ते द्रवं ह्यपि । सर्वं सशेषमश्नीयात् पायसाज्याब्धिजैर्विना ।।१७०।।**

स+दधि+आर्द्रकः गुडः असत्। केवलं लवणं असत्। श्व+उदक्या+पतित+आदि+आर+श्रवणे, तत्+विलोकने, भुक्तौ परस्पर+स्पर्शे, गुरून् विना पङ्क्तिस्थ उत्थिते, यावत् उलूखल+आदेः ध्वनि, न अद्यात्।१६६-१६७। नष्टे दीपे न भोक्तव्यम्। मूत्रादि उत्सृतौ भुजिः न। लेह्यादि हस्त+दत्तं असत्। उच्छिष्टं भाजने न न्यसेत्।१६८। यतिः आस्य+अविकारेण अष्टौ ग्रासान् ग्रसेत्। वनी षोडश, अन्यः द्वात्रिंशत्, वर्णी इष्टम्। प्राक् मधुरं द्रवं,।१६९। मध्ये अम्लादि कठिनं, अन्त्यं द्रवं (भोक्तव्यम्)। पायस+आज्य+अब्धिजैः विना सर्वं सशेषं अश्नीयात्।१७०।

दही किंवा आल्यात मिसळलेला गूळ त्याज्य आहे. नुसते मीठ खाऊ नये. कुत्रे, विटाळशी, पतित इत्यादींचा आवाज कानांवर पडला तर किंवा ते दृष्टीसमोर आल्यास, जेवताना एकमेकांना स्पर्श झाल्यास, गुरूंवाचून पंगतीतील एकही व्यक्ती उठल्यास जेवण सोडून उठावे. उखळ, मुसळ किंवा जाते यांचा आवाज होत असताना जेवण थांबवावे.१६६-१६७. जेवताना दिवा विझला तर जेवू नये. मलमूत्र उत्सर्ग झाल्यास जेवू नये. चटणी, श्रीखंड इत्यादि लेह्य पदार्थ हातांनी वाढले तर निषिद्ध आहेत. उष्टे ताटात ठेवू नये.१६८. तोंड वेडवाकडे न करता त्यात मावतील एवढेच घास घ्यावेत. संन्याशाने आठ घास घ्यावेत. वानप्रस्थाने सोळा आणि गृहस्थाने बत्तीस घास घ्यावेत. ब्रह्मचाऱ्याने हवे तितके जेवावे. सुरुवातीला गोड आणि पातळ पदार्थ खावेत,(१६९) मध्ये आंबट आणि कठीण पदार्थ आणि शेवटी कडसर, तुरट आणि पातळ पदार्थ खावेत. दूध, तूप आणि मीठ सोडून सर्व पदार्थ पानांत थोडे ठेवून खावेत.१७०.

**नाद्यादव्रताऽहेर्कपर्व-नक्तं भूताष्टमी दिवा । तलप्रसृतशाखाभिर् भुक्तं फूत्कारतोऽप्यसत् ।।१७१।।**
**त्यक्त्वोच्छिष्टं क्षितौ मन्त्रात् पीतापोशनशेषकम्। कौ सिक्त्वा रौरव इति मन्त्राच्छुद्धकरास्यपात् ।।१७२।।**
**हस्तोद्धृष्टाम्बु सिक्त्वाक्षणोर्जपेच्छर्यातिमित्यपि । आतापिं चेति ताम्बूलं सत्पञ्चत्र्यैकपूगयुक् ।।१७३।।**
**साङ्गं प्राग्ब्रह्मणे दद्यादद्यान्नदोधवा यतिः । चूर्णाङ्घ्रिग्रशिरोनं सत्पर्णं चाहोवशेषकम् ।।१७४।।**

व्रत+अहे अर्कपर्व+नक्तं, भूत+अष्टमी दिवा न अद्यात्। तल+प्रसृत+शाखभिः, फूत्कारतः अपि भुक्तं असत्। १७१। मन्त्रात् उच्छिष्टं क्षितौ त्यक्त्वा, पीत+आपोशन+शेषं 'रौरव' इति मन्त्रात् कौ सिक्त्वा, शुद्ध+कर+आस्य+पात् ।१७२। हस्त+उद्धृष्ट+अम्बु अक्षणोः क्षिप्त्वा, 'शर्यातिं' इति जपेत्। 'आतापिं' च इति अपि। ताम्बूलं पञ्च+त्रि+एक+पूग+युक् सत्।१७३। प्राक् स+अङ्गं ब्रह्मणे दद्यात्। अदः अधवा, यतिः न अद्यात्। पर्णं चूर्ण+अङ्घ्रि+शिरा+ऊनं सत्। अहः अवशेषकं...।१७४।

एकादशीच्या दिवशी, अमावास्येला रात्री तसेच अष्टमी आणि चतुर्दशीला दिवसा, जेवू नये. तळहाताने किंवा पसरलेल्या बोटांनी किंवा फुरके मारून जेवणे निषिद्ध आहे.१७१. '*यजमानकुले जाता*' या मंत्राने उच्छिष्ट भूमीवर टाकून, '*रौरवे पूयनिलये*' या मंत्राने आपोशनाचे शेष पाणी जमिनीवर टाकावे. नंतर हात, तोंड आणि पाय धुवून(१७२) '*शर्यातिं च सुकन्यां च च्यवनं शक्रमश्विनौ। भोजनान्ते स्मराम्येतान्यतश्चक्षुर्न हीयते।*' या मंत्राचा जप करीत दोन्ही हातांनी पाणी डोळ्यांवर शिंपावे. मग '*आतापिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्वाशेषं। सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छन्त्वरोगं मम चास्तु देहे।।*' हा मंत्र म्हणत पोटावर हात फिरवावा.१७३. पाच, तीन किंवा एका सुपारीचा विडा ग्राह्य आहे. त्रयोदशगुणी विडा आपण घेण्यापूर्वी ब्राह्मणाला द्यावा. विधवा आणि संन्यासी यांनी विडा खाऊ नये. विड्यासाठी नागवेलीचे पान न चुरलेले, देठ आणि शिरा काढलेले असावे. दिवसाचा उरलेला 'भाग' पुढच्या श्लोकाशी संबंधित आहे.१७४.

**नयेत्पुराणमननात् ततो नक्तं कृतक्रियः । स्वपेद्यामोर्ध्वं द्वियामं विष्णवर्पितसमक्रियः ।।१७५।।**
**सुमुहूर्तकृते तल्पे स्तुवन्निट्सुखशाय्यहीन् । त्रिसन्ध्ये न स्वपेद्भूत्यां धान्येऽह्न्यमरगोगृहे ।।१७६।।**
**न श्मशानाध्ववल्मीक-घोरदेश उदक्शिराः । नग्नो नोर्ध्वं देवगुर्वोः प्रवासे प्राक्पदः स्वपेत् ।।१७७।।**
**कार्या निशाद्ययामान्तं सङ्कटान्तरिता क्रिया । नैशा निशीथपर्यंतं प्रायश्चित्तं ततः परम् ।।१७८।।**

अहः अवशेषकं पुराण+मननात् नयेत्। ततः कृत+क्रियः नक्तः विष्णु+अर्पित+सम+क्रियः याम+ऊर्ध्वं द्वि+यामं स्वपेत्।१७५। सु+मुहूर्त+कृते तल्पे निट्+सुखशायी+अहीन् स्तुवन् (स्वपेत)। त्रि+सन्ध्ये, भूत्यां, धान्ये, अह्नि अमर+गो+गृहे,।१७६। श्मशान+अध्व+वल्मीक+घोरदेशे उदक्+शिराः, नग्नः, देव+गुरोः ऊर्ध्वं न (स्वपेत)। प्रवासे प्राक्+पदः स्वपेत्।१७७। सङ्कट+अन्तरिता क्रिया निशा+आद्य+याम+अन्तं कार्या। नैशा निशीथ+पर्यन्तम्। ततः परं प्रायश्चित्तम्।१७८।

उरलेला दिवस पुराणाच्या चिंतनात घालवावा. नंतर रात्रीची संध्या आणि पूजा करून दिवसभराची सर्व कर्मे विष्णूला अर्पण करावीत. भगवदुक्तीला अनुसरून आपण जे जे करतो, जे खातो, हवन करतो, दान करतो, तप करतो ते सर्व भगवंताला अर्पण करावे (*यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुषव मदर्पणम्।।* भ.गीता ९:२७). एक प्रहर रात्रीनंतर मधले दोन प्रहर झोप घ्यावी (म्हणजे सूर्योदयापूर्वी एक प्रहर उठावे).१७५. झोपेसाठी चांगल्या मुहूर्तावर केलेली खाट (पलंग) असावी. रात्र, सुखशायी (*अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः। कपिलो मुनिरास्तीकः पश्चैते सुखायिनः।।*) आणि सर्पांची (*यो जरत्कारुणो जातो..*) स्तुती करून निजावे. सकाळ, माध्याह्न आणि सायंकाळ ह्या तीन संध्याकाळात झोपू नये. राखेवर, धान्यावर, दिवसा, देवघरात, गोठ्यात,(१७६) श्मशानात, मार्गावर, वारुळाजवळ, भयाण जागी, उत्तरेला डोके करून, नागव्याने किंवा देव आणि वडिलांपेक्षा उंच जागेवर झोपू नये. प्रवासांत पूर्वेला पाय करून झोपावे.१७७. संकटामुळे न घडलेली दिवसाची विहित कर्मे रात्रीच्या पहिला प्रहर संपण्यापूर्वी करावीत. रात्रीची विहित कर्मे मध्यरात्रीपूर्वी करावीत. त्यानंतरही न घडल्यास प्रायश्चित्त घ्यावे.१७८.

**कर्मवैगुण्यादिदोषे लोपादावपि सर्वशः । प्रायश्चित्तं चरेद्विद्वान् यथावन्नान्यथा शुचिः ।।१७९।।**
**स्वर्क्षे स्वजायामृतूर्ध्वं शुद्धामुपगमेद्रहः । प्राक्चतुर्निट्श्राद्धतत्प्राग् दिनाहोव्रतपर्वसु ।।१८०।।**
**जन्माहाद्यष्टमीभूत-मूलान्त्यपितृभेषु नो । कैश्चिदुक्तं दशाब्दोर्ध्वं वर्णी स्यादृतुगः सदा ।।१८१।।**
**द्वेषादिनोपगच्छेद्यो नर्तौ स भ्रूणहाप्यृतौ । यो विदेशं व्रजेद्वन्ध्यां कन्यापुत्रान्वितामृते ।।१८२।।**

कर्म+वैगुण्य+आदि दोषे, लोपादौ अपि सर्वशः, विद्वान् यथावत् प्रायश्चित्तं चरेत्। अन्यथा शुचिः न।१७९। सु+अर्क्षे स्व+जायां शुद्धां रहः उपगमेत्। प्राक् चतुः+निट् श्राद्ध+तत्+प्राक्+दिन+अहो+व्रत+पर्वसु,।१८०। जन्म+अह+आदि+अष्टमी+भूत+मूल+पितृ+भेषु नो। कैश्चित् दश+अब्द+ऊर्ध्वं उक्तम्। सदा ऋतुगः वर्णी स्यात्।१८१। द्वेष+आदिना यो ऋतौ न उपगच्छेत स भ्रूणहा। यो ऋतौ, कन्या+पुत्र+अन्विता ऋते, विदेशं व्रजेत् अपि (भ्रूणहा)।१८२।

कर्म यथासांग न घडणे इत्यादि दोषांसाठी किंवा कर्माचा लोप झाला असता जाणीवपूर्वक शास्त्रानुसार योग्य ते प्रायश्चित्त घ्यावे. अन्यथा तो शुद्ध होत नाही.१७९. शुभ नक्षत्री, ऋतुकालानंतर शुद्ध झालेल्या स्वपत्नीसह एकांतात संभोग करावा. हे संभोगाला प्रवृत्त करणारे विधान नाही तर संभोगाला मर्यादा घालणारी परिसंख्या आहे. संभोग केलाच पाहिजे असे नाही. तर संभोग केलाच तर तो कुणाशी, कधी, कुठे करावा याचे नियमन आहे. ऋतुकालातील पहिल्या चार रात्री, श्राद्ध व त्याआधीचा दिवस, दिवसा, व्रतदिनी, पर्वकाळी,(१८०) जन्मादि तिथीदिवशी, अष्टमी, चतुर्दशी, मूळ, रेवती, मघा या नक्षत्रात संभोग वर्ज्य आहे. दहा वर्षांनंतर कन्येला रजस्वलत्व येते असे कांहीचे म्हणणे आहे. त्यापूर्वीच तिचा विवाह करावा. वरील नियम पाळून ऋतुकाळातच स्त्रीसंग करणारा गृहस्थही ब्रह्मचारी होतो.१८१. द्वेषादिकांमुळे जो ऋतुकाळात भार्येशी संग करीत नाही त्याला भ्रूणहत्येचे पाप लागते. तसेच ऋतुकाळात दूरदेशी जाणाऱ्यालाही भ्रूणहत्येचा दोष सांगितला आहे. पत्नीला मुले-मुली असतील किंवा ती वंध्या असेल तर हा दोष नाही.१८२.

**षोडशाहमृतुः कन्याऽसमेऽत्राह्नि समे सुतः । भवेन्निषेकसमये यादृक्चित्तविकल्पना ।।१८३।।**
**भ्रूणस्तद्वदतस्ताभ्यां सत्त्वं धार्यं हिताप्तये । पितृत्राता हि सत्पुत्रः प्रायोऽपुत्राः पतन्त्यधः ।।१८४।।**
**पितृतारक एकोऽपि सत्पुत्रोत्र ध्रुवादिवत् । किं कार्यं बहुभिर्दुष्टैर् धार्तराष्ट्रशतोपमैः ।।१८५।।**
**तारकोऽत्रैवमाचारः प्रोक्तः शाक्त्यादिसंमतः । विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भव ।।१८६।।**
**उभयीसिद्धिभाजस्ते य आचारं चरन्त्यमुम् । स्वाचारहीना दण्ड्याः स्युर् ब्राह्मणास्तु विशेषतः ।।१८७।।**

षोडश+अहं ऋतुः। अत्र असमे कन्या, समे सुतः। निषेक+समये यादृक् चित्त+विकल्पना भवेत्,।१८३। तत्+वत् भ्रूणः। अतः ताभ्यां हित+आप्तये सत्त्वं धार्यम्। प्रायः अपुत्राः अधः पतन्ति।१८४। अत्र ध्रुव+आदि+वत् एकः अपि सत्पुत्रः पितृतारकः। बहुभिः धार्तराष्ट्र+शत+उपमैः दुष्टैः किं कार्यम्?१८५। अत्र प्रोक्तः शाक्त्य+आदि+संमतः आचारः एव तारकः। विचार+आचारं आदाय कर्म कुर्वन् सुखी भव।१८६। ये अमुं आचारः चरन्ति ते उभयी+सिद्धि+भाजः। स्व+आचार+हीनाः दण्ड्याः स्युः। ब्राह्मणाः तु विशेषतः।१८७।

रजोदर्शनानंतर सोळा दिवसांचा ऋतुकाल असतो. त्यात विषम दिवशी कन्या व सम दिवशी पुत्र होतात. संभोगसमयी मनाची जशी चांगली-वाईट अवस्था असते तसेच मूल होते. यासाठी दंपतीनी मैथुनाच्या काळी चांगली संतती होण्यासाठी सत्त्ववृत्ती धारण करावी. बहुतेक पुत्रहीन अधोगतीला जातात.१८४. मनुष्यलोकात ध्रुवादिकांप्रमाणे एकसुद्धा सत्पुत्र पित्याला तारून नेतो. धृतराष्ट्राच्या शंभर मुलांसारखे दुष्ट पुत्र काय कामाचे?१८५. इथे निरूपिलेला पराशरादि मुनींनी पुरस्कारलेला आचारच तारक आहे. अनाचार हा मालिन्याला कारण आहे आणि अति आचार मूर्खपणाचा ठरू शकतो (*अनाचारस्तु मालिन्यमत्याचारस्तु मूर्खता। विचाराचारमादाय कर्म कुर्वन्सुखी भवेत्।।*) ह्या स्मृतीच्या मार्गदर्शनानुसार विचारपूर्ण आचार करून कर्म करावे आणि सुखी व्हावे.१८६. जे हा आचारधर्म पाळतात ते ऐहिक आणि आमुष्मिक सिद्धी पावतात. आपला आचार सोडणारे, विशेषतः ब्राह्मण, शिक्षेला पात्र आहेत.१८७.

**इति गुरुमुखलब्धं धर्ममेनं चरन्स । द्विज इह सुखमिष्टं साधु भुक्त्वाऽप मोक्षम् ।**
**तत उदित इहासौ तिष्यलुप्तोऽपि धर्मो । विभुरपि लघुसिद्ध्यै भक्तियोगं ततान ।।१८८।।**

**।। इति श्रीगुरुचरिते कर्मयोगे कर्मकाण्डकथनं नाम अष्टमोध्यायः ।।**

**।। आदितोऽष्टादशोऽध्यायः ।।**

इति गुरु+मुख+लब्धं एनं धर्मं चरन् सः द्विजः इष्टं साधु सुखं भक्त्वा मोक्षं आप। ततः असौ तिष्य+लुप्तः अपि धर्मः इह उदितः। विभुः अपि लघु+सिद्ध्यै भक्तियोगं ततान।१८८।

साक्षात् श्रीगुरूंच्या मुखातून लाभलेल्या ह्या धर्माचे आचरण करून तो ब्राह्मण ह्या जन्मात अभीष्ट आणि धर्म्य अशा सुखाचा उपभोग घेऊन अंती मोक्ष पावला. कलिकाळांत लुप्तप्राय झालेला हा धर्म तेव्हापासून प्रकट झाला. अशा रीतीने क्रिया, कारक, फल आदिरूप प्रपञ्च ज्या निष्प्रपंच आत्म्यावर भासतो त्या आत्म्याचे यथार्थ रूप दर्शविण्यासाठी अधिकारानुसार चित्तशुद्धीसाठी ह्या कर्मकाण्डाची रचना झाली. त्यानंतर कलियुगांत लवकर सिद्धीला जाणारा भक्तियोग मांडला आहे.१८८.

**प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा कर्मकांडाचा पाचवा आणि आधीपासून अठरावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

**श्रीगुरुदेव दत्त।**

# ।। एकोनविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**कर्मयोगं ज्ञानयोग-सहायं चित्तशोधनम् । उक्त्वापि भगवान्कस्माद् भक्तियोगं जगौ वद ।।१।।**

नामधारक उवाच। ज्ञान+योग+सहायं चित्त+शोधनं कर्म+योगं उक्त्वा अपि भगवान् भक्ति+योगं कस्मात् जगौ? वद।१।

श्रीगणेशाय नमः। *पांच अध्यायांत श्रीगुरु नित्यकर्म उपदेशिती। जेणेचि पाविजे द्विजांनी योग्यता आणि चित्तशुद्धि ।। श्रद्धा-भक्ति-ध्यानयोगे ज्ञान उपजे सांगे श्रुति।* (कैवल्य उपनिषत् २) *जयांचे चित्त शुद्ध तयांलागीं ध्यानासाठी भक्ति सांगती।। वंध्येच्या कुशीं पुत्रजन्म तशी शुष्क काष्ठा पालवी। दावुनि द्विजाचे कुष्ठ नासती एकोणिसाव्या अध्यायी।* नामधारकाने सिद्धमुनींना विचारले, चित्तशुद्धीद्वारा ज्ञानयोगाला साह्यभूत असणारा कर्मयोग श्रीगुरूंनी सांगितला. मागच्या अध्यायात ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाची प्राप्ती करून देणाऱ्या आचारधर्माचे सार सांगून तो कसा मोक्षपर्यवसायी आहे तेही दाखविले. आता पुन्हा ह्या भक्तियोगाचे निरूपण भगवंतांनी का केले आहे?१.

सर्व साधनांचे कारणरूप भक्तीच या परमार्थात उत्तमोत्तम मार्ग आहे. या भक्तीचे स्वरूप विशद करताना श्रीस्वामिमहाराजांनी भक्तिमार्गातील दहा भूमिका दाखविल्या आहेत.

१. '**प्रथममसङ्गतया भगवदुद्देशेन स्वाश्रमोचित कर्मानुष्ठानम् ।**'

परमेश्वरप्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान हीच भक्तिमार्गाची पहिली भूमिका आहे. असा कर्मयोग ज्ञान व भक्ती या दोन्हींचा पायाच आहे. ज्ञानेश्वरमाउलींच्या मते कर्म करताना कर्तृत्वाचा अभिमान आणि फलाचा अभिलाष हे दोन बंध आहेत. 'तैसा कर्तृत्वाचा मद। आणि कर्मफळाचा आस्वाद। या दोहोंचेही नांव बंध। कर्माचा कीं।।' हा दुहेरी बंधांत न सांपडता केलेल्या कर्माने चित्तशुद्धी होते. ही भक्ती आणि ज्ञान या दोन्ही योगांना उपकारक आहे.

## ।। सिद्ध उवाच ।।

**भक्तिरेवानुत्तमात्र सर्वसाधनकारिणी । कर्मज्ञस्याप्यभक्तस्य मोघं कर्मेत्यथाब्रवीत् ।।२।।**

अत्र सर्व+साधन+कारिणी भक्तिः एव अनुत्तमा। अभक्तस्य कर्मज्ञस्य अपि कर्म मोघं इति। अथ (भक्तियोगं) अब्रवीत्।२।

२. **ततो महत्सेवा**.

असे ईश्वराच्या आराधनेसाठी स्वधर्माचे आचरण केल्याने ईश्वराची कृपा होते आणि ईश्वराभिन्न सद्गुरूंची प्राप्ती होते. संतांची किंवा सद्गुरूंची सेवा ही भक्तीची दुसरी भूमिका होय. (*ईश्वराराधनधिया स्वधर्माचरणात्सताम्। ईशप्रसादस्तद्रूपः सुलभश्चात्र सद्गुरुः।।*)

३. **ततस्तत्कृपा**.

संत आणि सद्गुरू यांच्या कृपेने ज्ञानाचे सर्व प्रतिबंध दूर होतात आणि चित्तातील सर्व दुर्भावना मावळतात. आणि मुक्तिदायक विज्ञान क्षणमात्रात प्रकट होते. '*सद्गुरोः संप्रसादेऽस्य प्रतिबंधक्षयस्तथा। दुर्भावनातिरस्काराद्विज्ञानं मुक्तिदं क्षणात्।।*' सद्गुरुकृपा ही भक्तीची तिसरी भूमिका आहे.

४. **ततस्तद्धर्मश्रद्धा**.

त्यानंतर त्यांच्या धर्मावर दृढ श्रद्धा होते.

५. **ततो भगवत्कथाश्रवणम्**.

पाचव्या भूमिकेत भगवंतांच्या कथांचे श्रवण घडते.

६. **ततो भगवति रतिः**

भगवंताच्या लीलांचे आणि गुणांचे श्रवण झाले की त्यांच्या पादपद्मी प्रेम उपजते.

७. **तया च देहद्वयविवेकज्ञानम्**.

ईश्वराच्या प्रेमातून स्थूल, सूक्ष्म, कारण या देहांचा विवेक होतो आणि आपण त्यापासून वेगळे असल्याची जाणीव होते.

८. **ततो दृढा भक्तिः**

मग भक्ती दृढ होते.

९. **ततो भगवत्तत्त्वज्ञानम्** .

दृढ भक्तीने भगवंताचे यथार्थ ज्ञान होते.

१० **ततस्तत्कृपया सर्वज्ञत्वादिभगवद्गुणाविर्भावः**

मग त्याच्याच कृपेने सर्वज्ञत्वादि त्याच्या गुणांचा आविर्भाव होतो. ही भक्तीची चरम भूमिका होय.

साहजिकच भक्तीचे परमश्रेष्ठत्व आणि सर्वसाधनकारित्व सिद्ध होते. भक्तीच्या अभावी तत्त्वज्ञानेही केलेले कर्म व्यर्थच आहे. ईशावास्योपनिषदात केवळ कर्माची उपासना करणारे गाढ अंधःकारांत प्रवेश करतात (*अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते।९.*) बृहदारण्यक उपनिषदांत (१:१५:१६) कर्माने पितृलोकाच्या प्राप्तीचे वर्णन असले तरी परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याच्या विषयी ते निरर्थकच ठरते. पितृलोकादि कर्माने प्राप्त होणारे लोक हे नश्वर आहेत; (छांदोग्य उ. ८:१:६). याउलट भगवत्प्रसादाने लभ्य असे ज्ञानरूप फल नित्य आहे असेच श्रुतींचे प्रतिपादन आहे. एका भक्तीनेच मोक्ष लाभतो असे सांगणाऱ्या अनेक श्रुती (*नान्यः पन्था विद्यतेऽयनाय।* श्वेताश्वतर उ.३:८) आणि स्मृती आहेत. '*तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते।।*' भ.गीता १०:१०. माझे निरंतर अनुसंधान ठेवून प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्या भक्तांना मी बुद्धियोग देतो, ज्यायोगे ते मला येऊन मिळतात.' '*पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।*' भ.गीता ८:२२. 'हे पार्था, तो परमपुरुष अनन्य भक्तीनेच लाभतो.' '*भक्त्या मामभिजानन्ति यावन्यश्चास्मि तत्त्वतः।*' भ.गीता १८:७५. या सर्व प्रमाणांवरून श्रीगुरूंनी चित्तशुद्धीकारक कर्मयोगानंतर ज्ञानप्रद भक्तियोगाचे निरूपण केले आहे.२.

**त्रिभिर्योगपथैरेव परस्परसहायकैः । ब्रह्माद्वन्द्वं समं शान्तं गम्यते नैकयोगतः ।।३।।**

त्रिभिः परस्पर+सहायकैः योगपथैः एव अद्वन्द्वं समं शांतं ब्रह्म गम्यते। न एक+योगतः।३।

कर्म, भक्ती आणि ज्ञान या तीनही परस्परांना साह्यभूत योगांच्या समुच्चयानेच निर्द्वंद्व, सम आणि शांत ब्रह्माची प्राप्ती होते. कोणत्याही एकाच योगाने नाही. हा फार महत्त्वाचा सिद्धांत श्रीस्वामिमहाराजांनी इथे मांडला आहे. हे तीनही मार्ग वेगवेगळे नसून एकमेकांना पूरक आहेत. त्या तिन्हींचा अवलंब क्रमशः केल्यानेच परमार्थ फलदायी होतो. केवळ कर्मयोगाचेच अनुष्ठान केले तर चित्तशुद्धी होईल; पण आत्मसाक्षात्कारासाठी आवश्यक ते ज्ञान होणार नाही. तसेच '*शास्त्रे परे च निष्णात*' अशा आचार्यांच्या प्रसादाने अपरोक्ष ज्ञान जरी झाले तरी त्याची धारणा होत नाही. असंभावना, विपरीतभावना इत्यादि प्रतिबंध चित्ताच्या मालिन्यामुळे अपरोक्ष ज्ञानालाही परोक्षासारखे करून टाकतात. आणि अपरोक्षसंस्कारसुद्धा भ्रमनिवृत्तीला असमर्थच ठरतो. परंतु भगवंताच्या भक्तीने चित्तातील मल समूल नष्ट झालेल्या आणि भगवंताकडूनच प्राप्त झालेल्या अपरोक्ष ज्ञानरूपी प्रसाद पावलेल्यांना मात्र कांही यत्न न करताच मोक्ष अगदी हाताच्या तळव्यावरच्या आवळ्यासारखा सुलभ आहे. म्हणूनच यमाने नचिकेताला सांगितले आहे की, ज्याला हा परमात्मा निवडतो त्यालाच तो प्राप्त होतो. (*यमेवैष वृणुते तमेव लभ्यः। कठ उ.* १:२:२३) श्वेताश्वतर उपनिषदांतही (६:२३) हाच सिद्धांत दृढ केला आहे. ज्याची देवावर परम भक्ती आहे आणि जशी देवावर तशीच गुरूवर आहे त्यालाच हे अर्थ प्रकाशतात (*यस्य देवे परा भक्ति यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः।।*).३.

**श्रद्धालुः सात्त्विको भक्तो नितरां भगवत्प्रियः । सकार्ममपि तद्भिन्नं शश्वत्क्षिपति दुर्भवे ।।४।।**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मण्यपि कर्म यः । स लोके भक्तिमान्धीमान् मुच्यते कर्मबन्धनात् ।।५।।**

श्रद्धालुः सात्त्विकः भक्तः नितरां भगवत्+प्रियः। तत्+भिन्नं सकार्मं अपि शश्वत् दुः+भवे क्षिपति।४। यः कर्मणि अकर्म पश्येत अकर्मण्यपि कर्म (पश्येत्) सः लोके भक्तिमान् धीमान् कर्म+बन्धनात् मुच्यते।५।

देवाला प्रिय होण्याचा भक्ती हाच एक उपाय आहे. माझ्या ठायी चित्त स्थिर करून जे परम श्रद्धेने, निरंतर ध्यान-भजनाने माझी उपासना करतात ते मी सर्व योग्यांत श्रेष्ठ मानतो (*मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते। श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः।।* भ.गीता १२:२) या भगवंतांच्या वचनावरून श्रद्धावान् आणि सात्त्विक भक्त त्यांना अत्यंत प्रिय आहे हे दिसते. चित्तांत भक्ती नसेल तर कितीही कर्मशूर झाला तरी त्याला ईश्वर पुनःपुनः दुःखमय अशा जन्ममरणरूपी संसारांत फिरवत ठेवतो. कठोपनिषदांत (१:२:५) सांगितल्याप्रमाणे अज्ञानमूलक कर्मांतच मग्न असलेले, स्वतःला पंडित मानणारे आंधळ्याच्या मागे जाणाऱ्या आंधळ्यांसारखे मूढ वेड्यावांकड्या मार्गांत फिरून संसारदुःख भोगतात. '*अविद्यायामन्तरे वर्तमानः स्वयं धीराः पण्डितम्मन्यमानाः। दन्द्रम्यमाणाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः।।*' भगवद्गीतेतही श्रीकृष्ण ह्याचीच पुष्टी करतात. त्या (आसुरी प्रवृत्तीच्या) द्वेषी, क्रूर नराधमांना मी वरचेवर संसारात अशुभ आणि आसुरी योनीत टाकतो (*तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु।।*).४.

हा श्रीमद्भगवद्गीतेतील (४:१८) श्लोकाचा अनुवाद आहे. लोहचुंबक आपल्या केवळ सान्निध्याने लोहांत गती निर्माण करतो. तसाच हा प्रत्यगात्मा (जीवात्मा) बुद्धी आणि इंद्रियांचा चालक आहे म्हणून त्यालाच '**कर्म**' ही संज्ञा दिली आहे. चालक असूनही त्याला त्यापासून कांहीही अभिमानादि विकार होत नाहीत. अशा आत्म्याशी इन्द्रियांकडून होणाऱ्या क्रियारूपी कर्माचा कांहीच संबंध नसतो.

**भक्तियोगमयं तस्य भक्तिगम्यस्य चेष्टितम् । शृणु तस्मिन्दृढा भक्तिः पूता यच्छ्रवणाद्भवेत् ।।६।।**

तस्य भक्ति+गम्यस्य भक्ति+योग+मयं चेष्टितं शृणु यत्+श्रवणात् पूता तस्मिन् दृढा भक्तिः भवेत्।६।

हाच संबंधाचा अभाव म्हणजे '**अकर्म**'. अर्थात् सर्व कर्माच्या चालक आत्म्याशी बुद्धी, इंद्रिये इत्यादींच्याकडून होणाऱ्या कर्माशी कांहीच संबंध नाही असे जो जाणतो तोच खरा बुद्धिमान. तसेच बुद्धी, इंद्रिये इत्यादि जड वस्तूंच्या ठायीच (**अकर्मणि**) जो जाणणे, ऐकणे, पाहणे इत्यादि कर्मे पाहतो तोच खरा बुद्धिमान. सर्वसाधारण जीवमात्र बुद्धी, इंद्रिये आदि उपाधीशी तादात्म्य झाल्याने आत्म्यावर (स्वतःवर) कर्तृत्वाचा आरोप करून भ्रमांत पडतात. *प्रकृति करी कर्मे । तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ।।* ज्ञानेश्वरी १८:३२६।।. जो विवेकी आहे, खरा शहाणा आहे, तो कर्माच्या ठिकाणी अकर्म पाहतो आणि अकर्माच्या ठिकाणी कर्म पाहतो. आपण बसलेली आगगाडी फलाटावरच उभी असूनही शेजारची गाडी सुटली की आपली गाडीच उलट दिशेने चालू लागल्याचा दृष्टिभ्रम होतो. तसाच अविद्येच्या मोहात सापडलेला जीव आपल्या ठिकाणी कर्म पाहतो. पण ते इंद्रियादि जड प्राकृतिक उपाधीचे (अकर्माचे) आहे असे जाणणारा बुद्धिमानच कर्मबंधांतून सुटतो. मोक्ष पावतो.५.

**भक्तीची व्याख्या -** त्या भक्तिगम्य श्रीगुरूंच्या भक्तियोगाने भरलेल्या लीला ऐक, ज्या ऐकून चित्त शुद्ध होऊन त्यांच्या ठायी दृढ भक्ती जडते. भक्ती म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी अनुरक्ती. **भज** धातूपासून हा शब्द झालेला आहे. *भज* या धातूला क्तिनि प्रत्यय लावून भक्ती हा शब्द होतो. हा भावात्मक घेतला तर *भजन* असा अर्थ होतो; तोच अधिकारार्थी घेतला तर ज्या क्रियेत जीव आणि ईश्वर वेगळे असतात (*विभेज्येते*) ती भक्ती; आणि करणार्थी भक्ती म्हणजे जिच्या योगाने कामादि दोषांचे भर्जन होते (*भज्यन्ते*) ती भक्ती.६.

**भिक्षां सशिष्यगुरव एकैकः प्रत्यहं ददौ । भास्कराख्यो द्विजो दीन आययौ तत्र भक्तिमान् ।।७।।**
**आदाय गुरवे भिक्षां दातुकामो गुरुप्रियः । स त्रिपुंभुक्तिपर्याप्तं तण्डुलादिकमाप तम् ।।८।।**
**तद्दिने केनचिद्दत्ता भिक्षा श्रीगुरवे वरा । शिष्यभक्तयुजे तत्र सोऽपि भोक्तुं ययौ द्विजः ।।९।।**
**सायमेत्य मठे भिक्षा-द्रव्यमादाय स द्विजः । सुष्वापैवं त्रिमासं स तत्र तस्थौ सुभाविकः ।।१०।।**

स+शिष्य+गुरवे प्रति+अहं एक+एकः भिक्षां ददौ। तत्र भास्कर+आख्यः दीनः भक्तिमान् द्विजः आययौ।७। सः गुरु+प्रियः गुरवे भिक्षां दातुकामः त्रि+पुं+भुक्ति+पर्याप्तं तण्डुल+आदिकं आदाय तं आप।८। तत् दिने केनचित् शिष्य+भक्त+युजे श्रीगुरवे वरा भिक्षा दत्ता। सः द्विजः अपि तत्र भोक्तुं ययो।९। सायं एत्य सः द्विजः भिक्षा+द्रव्यं आदाय मठे सुष्वाप। एवं सः सुभाविकः तत्र त्रि+मासः तस्थौ।१०।

गाणगापुरी रोज पाळीपाळीने एक एक ब्राह्मण श्रीगुरूंना शिष्यांसहित भिक्षेला बोलावीत. एकदा तिथे भास्कर नावाचा एक गरीब पण भक्तिमान ब्राह्मण आला.७. श्रीगुरूंवर प्रीती करणारा तो ब्राह्मण त्यांना भिक्षा देण्याच्या इच्छेने तीन माणसांच्या जेवण्यापुरते तांदूळ आदि साहित्य घेऊन त्यांच्याकडे मठांत आला.८. त्या दिवशी कुणी तरी श्रीगुरूंना शिष्य-भक्तांसहित उत्तम पक्वान्नसहित भिक्षा दिली. तो भास्कर ब्राह्मणही त्यांच्याबरोबर तिकडेच जेवायला गेला.९. जेवून संध्याकाळी परतल्यावर तो ब्राह्मण आपण आणलेली भिक्षेची सामुग्री घेऊन मठातच झोपला. अशा रीतीने रोजच श्रीगुरूंच्या पंक्तीला जेवून परत येऊन मठात झोपण्याचा त्याचा क्रम सुरू झाला. पाहता पाहता तीन महिने असेच गेले.१०.

**तं तत्रोपहसन्ति स्म प्राप्य स्वल्पान्नतो गुरुम् । भिक्षां दातुं प्राज्यशिष्यं पुष्णाति स्वमितीतरे ।।११।।**
**तज्ज्ञात्वा तं प्रभुः प्राह भक्तियोगविधित्सया । द्राङ्मे सशिष्यभक्ताय भिक्षां देह्यद्य भाविक ।।१२।।**
**तच्छ्रुत्वा हृषितः शाक-सितादुग्धघृतादिकम् । स आनीय स्वयं पाकं कर्तुमारेभ उत्तमम् ।।१३।।**

तत्र तं स्वल्प+अन्नतः प्राज्य+शिष्यं गुरुं भिक्षां दातुं प्राप्य स्वं पुष्णाति' इति इतरे हसन्ति स्म।११। प्रभुः तत् ज्ञात्वा भक्ति+योग+विधित्सया तं प्राह, '(हे) भाविक, अद्य स+शिष्य+भक्ताय मे द्राक् भिक्षां देही'।१२। तत् श्रुत्वा हृषितः सः शाक+सिता+दुग्ध+घृत+आदिकं आनीय स्वयं उत्तमं पाकं कर्तुं आरेभे।१३।

त्याचा हा क्रम पाहून इतर लोक त्याची थट्टा करू लागले, 'हा पहा, मोठा शिष्यपरिवार असलेल्या आपल्या गुरूंना भिक्षा द्यायला म्हणून मोजकी सामुग्री घेऊन आला आहे; पण त्या निमित्ताने आपलेच उदरभरण करतो आहे.'११. त्या लोकांनी केलेला त्याचा उपहास श्रीगुरूंच्या ध्यानात आला. तेव्हा भक्तियोगाचे प्रात्यक्षिक दाखविण्याच्या इच्छेने ते भास्कराला म्हणाले, 'अरे भाविका, आज मला सर्व शिष्य आणि भक्तांसहित लवकर भिक्षा दे.'१२. ते ऐकून भास्कर एकदम आनंदित झाला. त्याने लगेच साखर, दूध, तूप वगैरे पदार्थ आणले उत्साहाने स्वतःच उत्तम स्वयंपाक करायला लागला.१३. त्या वेळी दुसऱ्या एका भक्ताने श्रीगुरूंना भिक्षा देण्याची इच्छा प्रकट केली. त्याला, 'तू उद्या भिक्षा दे' असे सांगून ते भास्कराला म्हणाले, 'सगळ्यांना आमंत्रण कर!' पहिले कुणाचे भिक्षेचे बोलावणे नसताना 'उद्या बोलव' असे सांगणे संन्यासधर्माच्या नियमात बसत नाही. पण इथे श्रीगुरूंसाठी '**अज**' शब्दाची योजना करून ते जन्ममरणादि विकारांच्या पलीकडे असल्याचे सूचित केले आहे. धर्मरक्षणासाठी स्वेच्छेने नरदेह धारण केलेल्या भक्तपराधीन पूर्णकाम श्रीगुरूंनी क्वचित् भक्तवात्सल्याने संन्यासधर्माची मर्यादा उल्लंघन केली तरी त्याचा त्यांना यत्किञ्चितही दोष लागत नाही. ज्ञानी पुरुषांनी विधिनिषेधाचे अतिक्रमण केले तरीही त्यांचे ज्ञान अबाधितच राहते. ब्रह्मज्ञानी पुरुषाचा महिमा नित्य आहे. तो कर्मामुळे वाढत वा घटत नाही असे बृहदारण्यक उपनिषदाचे (४:४:३३) प्रतिपादन आहे. (*एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा न कनीयान्।*). अर्थात् शिष्यांनी मात्र त्यांचे अनुकरण करून चालणार नाही.

**दातुं तदान्यमप्युत्कं भिक्षां देहि श्व इत्यजः । तं निवार्याह्वयाशेषान्भोक्तुमित्याह भास्करम् ।।१४।।**
**तच्छ्रुत्वाप्याह्वयत्तान्स त ऊचुर्लज्जसे न किम् । पक्तान्नकणतुल्यान्नः किमाहूय करिष्यसि ।।१५।।**

तदा अन्यं अपि भिक्षां दातुं उत्कं अजः 'श्वः देहि' इति निवार्य, 'अशेषान् आह्वय' इति भास्करं आह।१४। तत् श्रुत्वा सः तान् आह्वयत्। ते ऊचुः। 'न लज्जसे किम्? पक्त+अन्न+कण+तुल्यात् नः आहूय किं करिष्यसि?'१५।

तैत्तिरीय उपनिषदाच्या आदेशानुसार, 'जे आमचे सुचरित आहे त्याचेच तू अनुकरण कर, इतरांचे नाही.' (*यान्यस्माकं सुचरितव्यानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि।*) केवळ पूर्वीच्या माहात्म्यांनी केले म्हणून त्याचे अनुकरण करणे श्रुतीला मान्य नाही. परशुरामानी मातेचा वध केला; शुनःशेपाने पित्याचा, याज्ञवल्क्याने आचार्यांचा, गौतमाने इंद्ररूप अतिथीचा त्याग केला; बह्मदेवांनी आपल्या कन्येशी संग केला; इंद्राने पुरोहिताचा वध केला; बलरामाने क्षत्रिय असून सुरापान केले, तसेच पुराणिकाचा वध केला; चंद्राने गुरुपत्नीचे अपहरण केले; म्हणून आपणही तसेच वागावे असे नाही तर या महान पुरुषांनी जी प्रसिद्ध, दोषरहित, अनिंद्य, शास्त्रमान्य, लोकमान्य अशी लौकिक व वैदिक कर्तव्ये केली त्यांचे अनुकरण करावे असा वेदवाक्याचा आशय आहे. उदाहरणार्थ, परशुरामाने अत्यंत दुष्कर असूनही पित्याची आज्ञा पाळली; शुनःशेपाने विश्वामित्राच्या उपकाराची जाणीव ठेवली; याज्ञवल्क्याने तपाचरणाने सूर्याला प्रसन्न करून शुक्लयजुर्वेदाचे प्रतिपादन केले; गौतमाने स्वपत्नीशी व्यभिचार करणाऱ्या इंद्राचेही प्राण घेतले नाहीत; ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या उत्पत्तीसाठी प्रचंड श्रम केले; साक्षात् शेष असूनही देवब्राह्मणांच्या कार्यासाठी बलरामाने मानवाचा देह स्वीकारला; त्रैलोक्याच्या स्वास्थ्यासाठी इंद्राने अतिनिंद्य असे ब्रह्महत्येचे पाप अंगीकारले; चंद्राने गुरूंची महान् कीर्ती वाढविली इत्यदि सत्कर्मांचे अनुकरण करावे, असा श्रुतीचा आदेश आहे. श्रीगुरूंनी केलेल्या राजोपचारांचे धारण, पालखीत बसणे इत्यादि अन्य कर्मे सुद्धा त्यांच्या तेजस्वीयतेमुळे निंदनीय नाहीत. मात्र इतरानी त्यांचे अनुकरण केल्यास त्यांचे पतन होणार हे निश्चित!१४. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो ब्राह्मणांना आमंत्रण करू लागला. ते त्याला म्हणाले, 'तुला कांही लाजलज्जा आहे की नाही? तू शिजवलेल्या अन्नांत जेवढे कण आहेत तितकेच आम्ही जेवणारे आहोत. आम्हाला बोलावून काय करणार आहेस?'१५.

**तच्छ्रुत्वैत्य गुरुं तत्स शशंस भगवांस्तदा । आनयित्वात्र भोक्तव्यं सर्वैरित्याह तान्गुरुः ।।१६।।**
**शङ्किता अपि तद्वाक्यात् तूष्णीं स्थित्वा बहूनि ते । निर्माय भुक्तिपात्राणि सर्वे स्नात्वाययुः पुनः ।।१७।।**
**शाट्येशस्याज्ञयाच्छाद्य सिद्धान्नं तीर्थमन्त्रितम् । सहान्यैः षड्विधं सोऽदाद् गुरवे ब्राह्मणैः सह ।।१८।।**
**भक्ताञ्छिष्यान्स तत्रत्यां-स्त्र्यपत्येष्टयुजो द्विजान् । गुरुं चेष्टं सुखं भोक्तुं प्रार्थयामास सादरम् ।।१९।।**
**परमान्नान्नपौल्याज्य-सूपशाकादिषड्रसैः । षोढान्नममितं नीतं त्रिपुंपर्याप्तपाकतः ।।२०।।**

तत् श्रुत्वा सः गुरुं एत्य शशंस। तदा भगवान् गुरुः तान् अत्र आनयित्वा, 'सर्वैः भोक्तव्यम्', इति आह।१६। ते शंकिता अपि तत्+वाक्यात् तूष्णीं स्थित्वा सर्वे बहूनि भुक्ति+पात्राणि निर्माय स्नात्वा पुनः आययुः।१७। सः ईशस्य आज्ञया तीर्थ+मन्त्रितं षड्+विधं सिद्धान्नं शाट्या आच्छाद्य अन्यैः ब्राह्मणैः सह गुरवे अदात्।१८। सः तत्रत्यान् स्त्री+अपत्य+इष्ट+युजाः द्विजान् गुरुं च, इष्टं सुखं भोक्तुं सादरं प्रार्थयामास।१९। त्रि+पुं+पर्याप्त+पाकतः परमान्न+अन्न+आज्य+सूप+ शाकादि षड्रसैः षोढान्नं अमितं नीतम्।२०।

त्यांचे ते बोलणे ऐकून तो बिचारा श्रीगुरूंकडे आला आणि त्याने त्यांना ते सांगितले. तेव्हां श्रीगुरू भगवान् म्हणाले, त्या सर्वांना इकडे आणून त्यांच्याबरोबरच आज जेवायचे आहे. हा श्रीगुरूंचा निरोप ऐकल्यावर त्या ब्राह्मणांनी मनांतला संशय मनांतच ठेवून सगळ्यांनी पत्रावळी केल्या आणि स्नानादिक उरकून मठात आले.१७. मग त्या भास्कर ब्राह्मणाने श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार केलेल्या सर्व स्वयंपाकावर मंत्रित तीर्थाने प्रोक्षण केले आणि त्यावर श्रीगुरुदेवांची छाटी टाकली. मग इतर कांही ब्राह्मणांच्या मदतीने ते सहा प्रकारचे अन्न श्रीगुरूंना आणि ब्राह्मणांना वाढले. नवव्या अध्यायात भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चार प्रकारचे (चतुर्विध) अन्न सांगितले. त्यांत पापड कुरुड्या इत्यादि चर्व्य आणि दूध, पानक इत्यादि पेय हे दोन प्रकार धरून षड्विध अन्न होते.१८. मग त्या भास्कराने गाणगापूरच्या सर्व ब्राह्मणांना, त्याच्या स्त्रिया, मुले, इष्ट आदिंसहित सर्वांना आणि श्रीगुरूंना आदराने हात जोडून हवे ते सुखाने जेवण्यासाठी प्रार्थना केली.१९. तीन माणसांपुरत्याच केलेल्या त्या स्वयंपाकातून पायस, पोळ्या, तूप, वरण, भाज्या इत्यादि षड्रसपूर्ण (गोड, तिखट, आंबट, खारट, तुरट व कडू) षड्विध अन्न किती नेले त्याची मोजदाद नाही.२०.

**नीत्वा नीत्वापि भोक्तृभ्यो दत्तं तत्र तु पूर्ववत् । नाप्यल्पं दातृभिस्तष्टं चेष्टा भगवतस्त्वियम् ।।२१।।**
**भुक्तं सशेषमाकण्ठं तृप्ताः स्मोऽलमिति द्विजाः । उक्त्वोत्तस्थुः सहाजेन ततो गुर्वाज्ञयाङ्घ्रिजान् ।।२२।।**
**हीनांश्चाहूय तेभ्योऽदात्कामं नान्नं व्यहीयत । पशुपक्षिमृगादिभ्यः प्रकामं स उपानयत् ।।२३।।**
**न शिष्टास्तत्र केपीति श्रुत्वा भुक्त्वा तदाज्ञया । यादोभ्योऽदात्स शेषान्नं तदा निःशेषतां ययौ ।।२४।।**
**माधुर्यं सुरसान्नस्य दुर्लभं ह्यमृतान्धसाम् । स्वप्नेऽपि न श्रुतं रुच्यं तृप्तिरेषाप्यलौकिकी ।।२५।।**

नीत्वा नीत्वा भोक्तृभ्यः दत्तं तत्र तु पूर्ववत्। न अल्पं न अपि दातृभिः तष्टम्। इयं तु भगवतः चेष्टा।२१। द्विजाः सशेषं 'आकण्ठं भुक्तं', 'तृप्ताः स्मः', 'अलं' इति उक्त्वा अजेन सह उत्तस्थुः। तदा सः गुरु+आज्ञया हीनां च आहूय तेभ्यो कामं (अन्नं) अदात्, अन्नं न व्यहीयत्। सः पशु+पक्षि+मृग+आदिभ्यः प्रकामं उपानयत्।२२-२३। 'के अपि न शिष्टा' इति श्रुत्वा तत्+आज्ञया भुक्त्वा सः शेष अन्नं यादोभ्यः अदात्। तदा निःशेषतां ययौ।२४। सुरस+अन्नस्य माधुर्यं अमृत+अन्धसां हि दुर्लभम्। स्वप्ने अपि न श्रुतं रुच्यम्। एषा तृप्तिः अपि अलौकिकी।२५।

भरभरून नेऊन जेवणाऱ्यांना वाढले तरी ते छाटीखालचे अन्न जसेच्या तसेच राहिले. न त्यात कांही घट झाली, न वाढणाऱ्यांनाही कमी पडले! ही अष्टैश्वर्यसंपन्न भगवंताचीच लीला होय.२१. सगळे ब्राह्मण 'पुरे, पुरे', 'आम्ही तृप्त झालो', 'गळ्यापाशी अन्न आले', असे म्हणत श्रीगुरूंच्या सह उठले. मग श्रीगुरूंच्या आज्ञेने भास्कराने शूद्रादिकांना बोलावून त्यांना यथेच्छ अन्न वाढून दिले. तरीही ते कमी झाले नाही असे पाहून पशुपक्ष्यांनाही भरपूर घातले.२२-२३. शेवटी गावात कुणीही जेवायचे राहिले नाही याची खातरजमा करून तो ब्राह्मण श्रीगुरूंच्या आज्ञेने जेवला. नंतर उरलेले अन्न त्याने नदीत जलचरांना घातले तेव्हा कुठे ते अन्न संपले.२४. तिथे जेवलेले लोक म्हणू लागले, या रसभरित अन्नाची गोडी खरोखर देवदुर्लभ आहे. स्वप्नातही इतके रुचकर अन्न खायला काय ऐकायलाही मिळाले नाही. या अन्नाने आलेली ही तृप्तीसुद्धा अलौकिक आहे.२५.

**प्राक्पार्थसङ्कटेऽरण्ये निशीथेऽदात्स्वमायया । ऋषिभ्योऽन्नं हरिरिति श्रुतं दृष्टं त्वदोऽत्र तु ।।२६।।**

'प्राक् हरिः पार्थ+सङ्कटे अरण्ये निशीथे स्व+मायया ऋषिभ्यः अन्नं अदात् इति श्रुतम्। अत्र तु दृष्टम्।२६।

'पूर्वी पांडवांवरील संकटाचे निवारण करण्यासाठी श्रीकृष्णांनी अरण्यांत आपल्या मायेच्या प्रभावाने ऋषींना अन्न दिले असे ऐकले होते. पण आज मात्र प्रत्यक्ष पाहण्यात आले.' ही महाभारतातील कथा थोडक्यात अशी. एकदा दुर्योधनाने दुर्वास ऋषींचे आतिथ्य करून त्यांना प्रसन्न करून घेतले. त्यात त्याचा हेतू असा होता की द्यूतांत राज्य गमावून वनवासात असलेल्या पांडवांचा दुर्वास ऋषींच्या शापाने नाश व्हावा. म्हणून दुर्योधनाने त्यांना असा वर मागितला की, 'आमच्या कुळांत युधिष्ठिर ज्येष्ठ आहे. त्याचेही आतिथ्य आपण स्वीकारावे. मात्र आमच्या द्रौपदीवहिनी उपाशी असतांना आपण जाऊ नये. त्यांचे जेवण झाले की मग जावे.' दुर्वास मुनी पांडवांच्या घरी रात्रीच्या वेळी गेले. युधिष्ठिराने परमादराने त्यांचे स्वागत केले आणि आह्निक उरकून जेवायला येण्याची विनंती केली. आपल्या शिष्यसंघाबरोबर मुनी नदीवर स्नानादिकांसाठी गेले. द्रोपदीला सूर्याने दिलेल्या थाळीतून अक्षय अन्न मिळत असे. मात्र तिचे जेवण झाल्यानंतर ते बंद होत असे. तेव्हा आता या सर्व ऋषींच्या भोजनाची काय व्यवस्था करावी अशा चिंतेत द्रौपदी पडली. तेव्हा तिने भगवान श्रीकृष्णांचे स्मरण केले. आठवण केल्याबरोबर भक्तवत्सल श्रीकृष्ण तात्काळ तिच्यासमोर उपस्थित झाले. द्रौपदीने सांगितलेला वृत्तांत ऐकून भगवान म्हणाले, 'त्या ऋषींच्या जेवणाचे आपण पाहू काय करायचे ते. आधी मला भूक लागली आहे! कांही तरी खायला दे.' द्रौपदीला खूप लाज वाटली. ती म्हणाली, 'अरे कृष्णा, सर्वांची जेवणे झाल्यावर मी जेवते. माझे जेवण होईपर्यंत थाळीतील अन्न अक्षय असते. पण माझे जेवण झाल्यावर मात्र थाळीत कांहीच अन्न उरत नाही.' तेव्हा द्रौपदीला खूप आग्रहाने श्रीकृष्णांनी ती थाळी आणायला लावली. त्या वेळी त्या थाळीच्या काठाशी किंचितशी भाजी लागलेली होती. ती बोटाने चाटून श्रीकृष्णाने, 'या अन्नाने विश्वात्मा भगवान प्रसन्न होवो, (*अनेन विश्वात्मा भगवान प्रीयताम्।*)' असे म्हटले. मग त्यांनी द्रौपदीला सर्व मुनींना जेवायला बोलवायला सांगितले. तेव्हा ते सगळेच अत्यंत तृप्त झाले होते.२६.

**नृणां चतुःसहस्राणि भुक्तानि स्वल्पपाकतः । जीवा अगणिता भुक्ता मायाऽतर्क्येयमीशितुः ।।२७।।**
**भास्करोऽयं प्रियो भक्तो यत्प्रसादोऽस्य नान्यके । त्रिमासं सर्वदा तेन पादसंवाहनादिभिः ।।२८।।**
**श्रद्धाभक्त्यैव भगवान् सेवितस्तत्फलं त्विदम् । इत्युक्त्वान्ये नराः प्रेम्णा तुष्टुवुः श्रीगुरुं परम् ।।२९।।**

स्वल्प+पाकतः नृणां चतुः सहस्राणि भुक्तानि, जीवाः अगणिताः भुक्ताः। इयं ईशितुः माया अतर्क्या।२७। अयं भास्करः प्रियः भक्तः यत् अस्य प्रसादः न अन्यके। तेन त्रिमासं सर्वदा पाद+संवाहनादिभिः श्रद्धा+भक्त्या एव भगवान् सेवितः इदं तत्+फलम्।' अति उक्त्वा अन्ये नराः परं श्रीगुरुं प्रेम्णा तुष्टुवुः।२८-२९।

थोड्याशाच स्वयंपाकात चार हजार माणसे आणि अगणित जीव जेवून तृप्त झाले, ही ईश्वराची माया खरेच अतर्क्य आहे. 'अणूपेक्षांही सूक्ष्म असलेला हा परमात्मा अतर्क्य आहे,' ह्या कठोपनिषदाच्या (१:२:८) प्रतिपादनाची साक्ष इथे पटते.२७. ते लोक पुढे एकमेकांना म्हणू लागले, हा भास्कर श्रीगुरूंचा प्रिय भक्त आहे; कारण याच्यासारखा कृपाप्रसाद दुसऱ्या कुणालाही मिळाला नाही. त्याने तीन महिने श्रद्धेने आणि भक्तीने श्रीगुरुभगवंतांची पाय दाबणे इत्यादि सेवा केली त्याचेच हे फळ होय. असे बोलून दुसरे लोक प्रेमभराने श्रेष्ठ अशा श्रीगुरूंची स्तुती करू लागले.२८-२९.

श्रीगुरूंनी भास्कराला ईप्सित वर देऊन त्याच्या घरी बोळविले. पुढे तो गुरुप्रसादाने सर्व ऐहिक भोगांचा भोग घेऊन अन्ती सायुज्य मुक्ती पावला. अंत म्हणजे देहांत असा अर्थ घ्यावा किंवा सत्य आणि असत्य, द्वैत आणि अद्वैत यांची सरमिसळ भासवणाऱ्या संसाररूपी भ्रमाचा अंत असा घ्यावा. सायुज्य मुक्ती म्हणजे आत्यंतिक मोक्ष. अर्थात् निर्गुण साक्षात्कार.

**दत्वा प्रभुर्भास्करमीप्सितं वरं प्रस्थापयामास गृहाय स द्विजः ।**
**ईशप्रसादात्सकलार्थयुग्ययौ सायुज्यमन्ते दृढभक्तियोगतः ।।३०।।**

प्रभुः भास्करं ईप्सित+वरं दत्वा गृहाय प्रस्थापयामास। सः द्विजः ईश+प्रसादात् सकल+अर्थ+युक् अन्ते दृढ+भक्तितः सायुज्यं ययौ।३०।

इथे अशी शंका येऊ शकते की, श्रीगुरू हे साक्षात् ईश्वराचेच अवतार असले तरी ते साकार असल्याने सगुणच आहेत. मग सगुणाच्या उपासनेने निर्गुण साक्षात्काररूपी आत्यंतिक मोक्ष कसा होईल? याविषयी अमलानंद कल्पतरूंत लिहितात - *निर्विशेषं परं ब्रह्म साक्षात्कर्तुमनीश्वराः। ये मन्दास्तेऽनुकम्प्यन्ते सविशेषनिरूपणैः।। वशीकृते मनस्तेषां सगुणब्रह्मशीलनात्। तदेवाविर्भवेत्साक्षादपेतोपाधिकल्पनम्।।* निर्गुण परब्रह्माचा साक्षात्कार करण्याला असमर्थ अशा मंदबुद्धीच्या साधकांवर दया करून श्रुतिमाउलीने सगुण ब्रह्माचे निरूपण केले आहे. सगुणब्रह्माच्या परिशीलनाने त्यांनी मनाला वश केल्यावर सहजच उपाधिरहित (निर्गुण) ब्रह्म प्रकट होते. ब्रह्म शब्द 'बृह' धातूपासून झाला आहे. वृद्ध (विस्तृत) वस्तू असा त्याचा अर्थ आहे. ही वृद्धी निरतिशय (unqualified) आहे. कारण त्याला कुठलेच संकोचक (limiting) उपपद वाचक वगैरे लावलेले नाही. '*अथातो ब्रह्मजिज्ञासा*' या सूत्राच्या भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे निरतिशय वृद्ध (वाढलेला, वाढणारा) या बृह धातूच्या अर्थांतूनच नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान हे अर्थ प्रतीत होतात. तेच ब्रह्म श्रीगुरू नृसिंहसरस्वती स्वामिमहाराजांच्या रूपाने अवतलेले आहे हे आपण आठव्या अध्यायात पाहिलेच आहे. सायुज्य म्हणजेच आत्यंतिक मोक्ष हा केवळ भगवत्प्रसादानेच लाभतो हे पुनःपुनः सांगितले आहे.३०.

**शृण्वन्यदप्यद्भुतमीशचेष्टितं गङ्गाह्वया तत्र तु षष्टिवत्सरा ।**
**साध्वी वशानर्च परमेशमन्वहं भक्त्यैकदोचे स तु तां किमिच्छसि ।।३१।।**

**।। गङ्गोवाच ।।**

**लोकोऽपुत्रस्य न स्वःस्था लुप्तपिण्डोदकक्रियाः । पितरोऽधः पतन्तीति श्रुत्वा स्वामिन् बिभेम्यहम् ।।३२।।**
**भवेऽग्रे सुपुत्राप्त्या गतिर्भूयादितीच्छया । सर्वेश तेऽर्चनं कुर्वे पाहि मां करुणानिधे ।।३३।।**

अन्यत् अद्भुतं ईश+चेष्टितं शृणु। तत्र तु गङ्गा+आह्वया षष्टि+वत्सरा वशा साध्वी अनु+अहं भक्त्या परम+ईशं आनर्च। एकदा सः तु तां ऊचे, 'किं इच्छसि?'३१। गङ्गा उवाच। 'अपुत्रस्य लोकः न। (हे) स्वामिन्, स्वः+स्थाः पितरः लुप्त+पिंड+उदक+क्रियाः अधः पतन्ति इति श्रुत्वा अहं बिभेमि।३२। (हे) सर्वेश, (हे) करुणा+निधे, अग्रे भवे सु+पुत्र+आप्त्या गतिः भवेत् इति इच्छया ते अर्चनं कुर्वे।३३।

साक्षात् ईश्वरस्वरूप सद्गुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक! तिथे गाणगापुरात एक गंगा नावाची साठ वर्षांची वंध्या सती रोज न चुकता येऊन अत्यंत भक्तीपूर्वक श्रीगुरू परमेश्वरांची पूजा करीत असे. एकदा त्यानी तिला विचारले, 'तुझी काय इच्छा आहे?'३१. गंगा उत्तरली, 'ऐतरेय ब्राह्मणांत (७:३:१) अपुत्राला (पर)लोक लाभत नाही असे म्हटले आहे. स्वर्गातही गेलेल्या पितरांचा, श्राद्ध आणि तर्पणाचा लोप झाल्याने अधःपात होतो असे वेदवचन ऐकून मला भीती वाटते.'३२. 'हे सर्वेश्वरा, दयासागरा, ह्या जन्मात नाही तरी निदान पुढच्या जन्मात सुपुत्राचा लाभ होऊन सद्गती मिळावी ह्याच इच्छेने मी आपले पूजन करते.'३३.

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**कमावर्तेन मायाब्धौ क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम् । क्वेयं तत्र स्मृतिस्तेऽत्र पुत्रौ गङ्गे भविष्यतः ॥३४॥**

**तच्छ्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वोचे पुत्रवत्यहो । निष्कला जातिवन्ध्यापि भवेयं त्वत्प्रसादतः ॥३५॥**

**व्रततीर्थार्चने यातं वयो मे पुत्रकामया । विशेषात्सेवितोऽश्वत्थो मौर्ख्याद्दास्यति किं स मे ॥३६॥**

॥ श्रीगुरुरुवाच ॥

**ब्रह्मनारदसंवादं शृण्वात्थ यदसत्तु तत् । नारदाश्वत्थमूलेऽहं मध्येऽजोऽग्रे शिवः पुनः ॥३७॥**

श्रीगुरुः उवाच। 'माया+अब्धौ कर्म+आवर्तनेन क्व भ्रमिष्यसि वेत्सि किम्? ते तत्र इयं स्मृतिः क्व? गङ्गे अत्र पुत्रौ भविष्यतः।'३४। तत् श्रुत्वा पल्लवे ग्रन्थिं बध्वा (सा) ऊचे। अहो निष्कला जाति+वन्ध्या अपि त्वत्+प्रसादात् पुत्रवती भवेयम्।३५। 'मे पुत्र+कामया वयः व्रत+तीर्थ+अर्चने यातम्। विशेषतः मौर्ख्यात् अश्वत्थः सेवितः। स मे किं दास्यति?'३६। श्रीगुरुः उवाच। 'यत् आत्थ तत् असत्। ब्रह्म+नारद+संवादं शृणु।' '(हे) नारद, अश्वत्थ+मूले अहं, मध्ये अजः अग्रे शिवः।३७।

श्रीगुरू तिला म्हणाले, 'या मायेच्या सागरांतील कर्माच्या चक्रात तू कुठे कुठे फिरणार आहेस हे तू जाणतेस काय? त्या जन्मात जरी तुला पुत्रप्राप्ती झाली तरी ती माझीच कृपा आहे ही आठवण तुला राहील का? ऐक गंगे, याच जन्मात तुला दोन (एक कन्या आणि एक) पुत्र होतील.'३४. ते ऐकून गंगेने पदराला गाठ मारली आणि म्हणाली, 'मी जन्मतःच वंध्या आहे आणि आतां तर मला ऋतूही येत नाही. तरी आपल्या प्रसादाने मी पुत्रवती होईन असा विश्वास वाटतो.'३५.

**अवाक्प्रत्यगुदक्शाखास् त्रयाणां प्राक्समाः सुराः । तीर्थाब्धयश्चाङ्कुरेषु गोयज्ञर्षिश्रुतिद्विजाः ।।३८।।**
**ॐकारोऽङ्घ्र्यन्तशीर्षस्थ इत्यश्वत्थोऽस्त्यसंस्कृतः ।**
**नार्च्यः संस्कृत्य मौञ्ज्युक्त-कालेऽस्मिन्सत्क्षणेऽर्चयेत् ।।३९।।**

पुनः त्रयाणां अवाक्, प्रत्यक्, उदक् शाखाः। प्राक् समाः सुराः। अङ्कुरेषु तीर्थ+अब्धयः च गो+यज्ञ+ऋषि+श्रुति+द्विजाः।३८। ॐकारः अङ्घ्रि+ अन्त+शीर्ष+स्थः। इति अश्वत्थः अस्ति। असंस्कृतः न अर्च्यः। अस्मिन् मौञ्जी+उक्त+काले संस्कृत्य सत्+क्षणे अर्चयेत्।३९।

'मी पुत्रप्राप्तीच्या इच्छेने व्रत, तीर्थे आणि पूजा करण्यात सगळे आयुष्य घालविले. विशेषतः अश्वत्थाची (पिंपळाची) पूजा-प्रदक्षिणादि सेवा केली. तो पिंपळ मला अभागिनीला काय पुत्र देणार?'३६. श्रीगुरू तिला म्हणाले, 'अश्वत्थाला तू बोल लावतेस तो खरा नाही. '*अश्वत्थः सर्ववृक्षाणां*' असे भगवंत गीतेत (१०:२६) सांगतात. अश्वत्थाचे (पिपंळाचे) माहात्म्य विशद करणारा नारद आणि ब्रह्मदेव यांचा संवाद तू ऐक. 'नारदाने प्रश्न केल्यावर ब्रह्मदेवांनी त्याला सांगितले, 'नारदा, अश्वत्थाच्या मुळाशी मी स्वतः, मध्ये विष्णू आणि शेंड्यावर शंकर वास करतो.३७. तसेच त्याच्या दक्षिण, पश्चिम आणि उत्तर शाखांवरही त्याच क्रमाने आम्ही वसतो. पूर्व शाखेवर सर्व देवता राहतात. आणि त्याच्या पालवीत सर्व तीर्थे, सागर, गोमाता, यज्ञ, ऋषी, वेद आणि ब्राह्मण वसतात.३८. ॐकाराच्या अ, उ आणि म या मात्रा त्याच्या मूळ, मध्य आणि टोकाशी, ऋक्, यजुः, साम या वेदांसहित तसेच भूः, भुवः, स्वः या लोकांसहित वास करतात. असा हा अश्वत्थ वृक्ष आहे. अश्वत्थाचे पूजन त्याची मुंज केल्याशिवाय करू नये. विहित काळी त्याची मुंज केल्यावर चांगला मुहूर्त पाहून पूजा करावी.'३९.

**नार्कारशुक्रनिट्सन्ध्या-कुयुक्पर्वादिषु स्पृशेत् । वर्णित्वमौनसत्त्वाढ्यो भजेन्नामुं वधूरपि ।।४०।।**
**तत्तले गोविशा लिप्ते रञ्जिते स्वस्ति वाचयेत् । संस्नाप्य सप्तकलशैः पूजयेत्स्वाधिकारतः ।।४१।।**
**ध्यात्वाष्टबाहुं श्रीविष्णु-रूपमावेष्ट्य वाससा । नाममन्त्रैर्मंदगत्या शक्त्या कार्याः प्रदक्षिणाः ।।४२।।**
**नमेत्प्रदक्षिणायास्तु भक्त्याद्यन्तसमाप्तिषु । पदे पदे मेधफलं दैन्यर्णार्त्यघतापहृत् ।।४३।।**
**ग्रहार्तिघ्नं सौरिवारे तन्नामोच्चारणं तरोः । सदेशेऽपैति नुः काल-मृत्यू रौद्रमनोर्जपात् ।।४४।।**

अर्क, आर, शुक्र, निट्, सन्ध्या, कुयुक्+पर्व आदिषु न स्पृशेत्। वर्णित्व+मौन+सत्त्व+आढ्यो अमुं ना, वधूः अपि भजेत्।४०। तत् तले गो+विशा लिप्ते स्वस्ति वाचयेत्। सप्त+कलशैः संस्नाप्य स्व+अधिकारतः पूजयेत्।।४१।। अष्ट+बाहुं श्रीविष्णु+रूपं ध्यात्वा वाससा आवेष्ट्य मन्द+गत्या शक्त्या प्रदक्षिणाः कार्या।४२। प्रदक्षिणायाः आदि+अन्त+समाप्तिषु भक्त्या नमेत्। पदे पदे मेध+फलं दैन्य+ऋण+आर्ति+अघ+ताप+हृत्।४३। सौरि+वारे तत्+नाम+उच्चारणं ग्रह+आर्ति+घ्नम्। तरोः सदेशे रौद्र+मनोः जपात् नुः काल+मृत्यू अपैति।४४।

रविवार, मंगळवार, शुक्रवार, रात्री, सायंकाळी अशुभ योगी वा पर्वकाळी अश्वत्थाला स्पर्श करू नये. ब्रह्मचर्य, मौन, सत्यवचन आदि नियम पाळून ह्याला पुरुषाने आणि स्त्रीनेही पुजावे.४०. अश्वत्थाच्या खाली गोमयाने सारवावे. प्रथम स्वस्तिवाचन करावे; मग सात कलशांनी त्याला स्नान घालावे आणि आपल्या स्त्री, पुरुष, वर्ण आदि अधिकारानुसार पूजा करावी.४१. श्रीविष्णूंच्या अष्टभुज रूपाचे ध्यान करावे. अश्वत्थाला वस्त्राने वेढावे. मग विष्णुसहस्रनामातील प्रत्येक नामाच्या चतुर्थ्यंत रूपाने जप करीत हळूहळू शक्त्यनुसार प्रदक्षिणा कराव्यात.४२. प्रदक्षिणेच्या सुरुवातीला, मध्यभागी आणि शेवटी भक्तीर्पूवक नमस्कार करावा. प्रदक्षिणेच्या पावलागणिक अश्वमेधाचे फळ मिळते. नामोच्चारणाने दैन्य, ऋण, पीडा, पाप आणि (आध्यात्मिकादि) ताप दूर होतात.४३. शनिवारी पिंपळाची प्रदक्षिणा करीत शनीच्या नावाचा उच्चार केल्याने ग्रहांची बाधा दूर होते. ('*कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोऽन्तको यमः। सौरिः शनैश्चरो मन्दो पिप्पलादेन संस्तुतः।।*' शनैश्चरस्तोत्र १४)४४.

**तत्रातिफलदा ब्रह्म-भुज्याप्लुतिजपाध्वराः । पुत्रादिकामसिद्ध्यै नो विलम्बोऽक्षय्यपुण्यदात् ।।४५।।**
**येनेह स्थापितोऽश्वत्थस्तेन स्वः स्थापितं कुलम् । येन च्छिन्नोऽपि वंशः स्वस्तेन च्छिन्नो न संशयः ।।४६।।**
**प्रदक्षिणादशांशेन हवनं तद्दशांशतः । कृत्वा ब्रह्मभुजिं दद्याद्धैमाश्वत्थार्थगोतिलान् ।।४७।।**
**सद्ब्रह्मभ्यो लभेदिष्टमित्यूचे नारदं विधिः । तस्मात्तं विधिना साध्वी भज द्राक्सिद्धिदोऽस्ति सः ।।४८।।**

तत्र ब्रह्म+भुजि+आप्लुति+अध्वराः अति+फलदाः। अक्षय्य+पुण्य+दात् पुत्र+आदि+काम+सिद्ध्यै नो विलम्बः।४५। येन इह अश्वत्थः स्थापितः तेन स्वः कुलं स्थापितम्। येन छिन्नः तेन अपि स्वः वंशः छिन्नः न संशयः।४६। प्रदक्षिणा+दश+अंशेन हवनं, तत् दशांशतः ब्रह्म+भुजिं कृत्वा हैम+अश्वत्थ+अर्थ+गो+तिलान् सत्+ब्रह्मेभ्यः दद्यात्। इष्टं लभेत। इति विधिः नारदं ऊचे। तस्मात् (हे) साध्वी, तं विधिना भज। सः द्राक् सिद्धिदः अस्ति।४७-४८।

अश्वत्थाच्या जवळ मृत्युंजय ('*त्र्यंबकं यजामहे*') मंत्राचा जप केला असता कालमृत्यूही टाळता येतो. मग अपमृत्यूची काय कथा? अश्वत्थाखाली ब्राह्मणभोजन, स्नान, जप, यज्ञ हे केले असता अधिक फळ मिळते. अक्षय्य पुण्य देणाऱ्या अश्वत्थाच्या सेवेने पुत्रादि इच्छांची पूर्ती होण्यास विलंब लागत नाही.४५.

ज्याने या भूलोकांत पिंपळ लावला त्याने आपला वंशच स्थिर केला; आणि ज्याने पिंपळाचे झाड तोडले त्याने जणू आपलाच वंशच्छेद केला.४६. व्रताच्या सांगतेसाठी उद्यापन सांगितले आहे. प्रदक्षिणेच्या दशांश हवन आणि त्याच्या दशांश ब्राह्मणभोजन करून सोन्याचा पिंपळ, गाय दक्षिणा आणि तीळ यांचे सात्त्विक आणि विद्वान् ब्राह्मणाला दान करावे. असे ब्रह्मदेवाने नारदांना सांगितले. असा संवादाचा समारोप करून श्रीगुरू गंगेला म्हणतात, 'याकरिता हे सती, त्या पिंपळाची तूं पूजा कर. तो शीघ्र सिद्धिदायक आहे.'४७-४८.

**त्वं भीमामरजायोगे स्नात्वा षट्कूल उत्तमम् । संगमस्थं भजाश्वत्थं सत्यं पुत्रौ भविष्यतः ।।४९।।**
**तथा कुर्वेऽपि षष्ट्यब्दा मत्वोक्तिं तव वेदवत् । इत्युक्त्वा सेश्वराश्वत्थं पत्या भेजे यथाविधि ।।५०।।**

'त्वं भीमा+अमरजा+योगे षट्कूले स्नात्वा सङ्गमस्थं उत्तमं अश्वत्थं भज। सत्यं पुत्रौ भविष्यति।'४९। 'तव उक्तिं वेदवत् मत्वा षष्टि+अब्दा अपि तथा कुर्वे,' इति उक्त्वा स+ईश्वर+अश्वत्थं पत्या यथाविधि भेजे।५०।

**सकाम उपासना -** इथे हे लक्षात घ्यायचे आहे की सकाम उपासना ही प्रत्यक्षतः मोक्षाला उपयुक्त नाही. तरी पण कामाने ज्यांची मने कलुषित आहेत त्यांना इच्छापूर्तीसाठी का होईना ईश्वराचे भजन घडते आणि अंतर्मुखता येऊन ईश्वरभजनाची गोडी लागते. ईश्वरभजनाच्या प्रभावाने कामबीजाचे भस्म होते. हा वस्तुशक्तीचा प्रभाव आहे. वासनेचे बीज जळून गेल्यावर ईश्वरभक्तीद्वारा अधिकार प्राप्त होतो आणि भगवंताचा कृपाप्रसाद होतो. क्षुद्रदेवतांच्या आराधनाने मिळालेल्या फळासारखे हे फळ नाशिवंत नसते. देवतामय अश्वत्थाच्या भजनाच्या उपदेशातून आणि त्याला ॐकाररूप दाखवून इथे असाही आदेश मिळतो की संसारवृक्षाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवावी. प्रपंचातही परमार्थ पाहावा असा भावार्थ.

पुढे तिला श्रीगुरूंनी सांगितले की, 'तू भीमा आणि अमरजा यांच्या संगमाच्या षट्कूलात स्नान करून संगमावरील उत्तम अशा पिंपळाची सेवा कर. खरोखर तुला एक कन्या आणि एक पुत्र होतील.' अन्नमय कोशाची ब्रह्मदृष्टीने उपासना केल्यास सर्व अन्नाची प्राप्ती होते तसेच हे फळ सांगितले आहे. आपल्या भावानुसार सिद्धी होते असा अभिप्राय.४९ 'आपले वचन वेदतुल्य मानून मी अश्वत्थाला देवतास्वरूप मानून त्याची सेवा करते' असे श्रीगुरूंना बोलून तिने आपल्या पतीसह त्या पिंपळाची आणि त्याखाली बसलेल्या सद्गुरूंची यथाविधी पूजा केली.५०.

**चतुर्थेऽह्न्याह तत्स्वप्ने कृत्वाश्वत्थप्रदक्षिणाः । यद्दास्यति गुरुर्भुङ्क्ष्व भवेत्पुत्र इति द्विजः ।।५१।।**
**साप्युत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य सद्गुरुम् । भक्त्या प्रदक्षिणीकृत्य साश्वत्थं प्रणनाम ह ।।५२।।**
**दत्त्वा फले स तां प्राह दानं देहि समाप्य सत् । व्रतं प्रदक्षिणारूपं फले भुंक्ष्वेष्टकामदे ।।५३।।**
**प्राग्युगेऽनेकपुत्राः स्युरौरसो दत्तकस्त्विह । औरसस्तूत्तमोऽस्यास्य-दर्शनं पितृमुक्तिदम् ।।५४।।**
**तत्साध्वीहौरसौ पुत्रौ तारकौ ते भविष्यतः । मदर्चनफलं त्वेतन्न सन्देहोऽत्र शोभने ।।५५।।**

अश्वत्थ+प्रदक्षिणाः कृत्वा चर्तुथे अह्नि तस्य स्वप्ने द्विजः 'यत् गुरुः दास्यति भुङ्क्ष्व' इति।५१। सा अपि उत्थाय ततः स्नात्वा सङ्गमं प्राप्य, सद्गुरुं स+अश्वत्थं भक्त्या प्रदक्षिणीकृत्य प्रणनाम ह।५२। सः तां फले दत्वा प्राह। प्रदक्षिणा+रूपं सत् व्रतं समाप्य इष्ट+कामदे फले भुङ्क्ष्व।५३। 'प्राक् युगे अनेक पुत्राः स्युः, इह तु औरसः दत्तकः (च)। औरसः तु उत्तम+उत्तमः, अस्य दर्शनं पितृ+मुक्तिदम्।५४। तत् (हे) साध्वि, इह ते औरसौ तारकौ पुत्रौ भविष्यतः। (हे) शोभने, एतत् तु मत्+अर्चन+फलं अत्र न संदेहः।५५।'

तिने आरंभिलेल्या अश्वत्थसेवेच्या चौथ्या दिवशी तिच्या स्वप्नात एका ब्राह्मणाने येऊन सांगितले की, 'पिंपळाला प्रदक्षिणा घातल्यावर तुला श्रीगुरू जे देतील ते भक्षण कर.'५१. तिने सकाळी उठून स्नान केले आणि संगमावर जाऊन पिंपळासहित सद्गुरूंना भक्तीपूर्वक प्रदक्षिणा करून नमस्कार केला.५२. त्यांनी तिला दोन फळे देऊन सांगितले की, 'तुझ्या प्रदक्षिणात्मक व्रताची दान करून समाप्ती कर आणि ही फळे खा.'५३. गरुडपुराणांत 'किती प्रकारचे पुत्र असतात?' या गरुडाच्या प्रश्नाला उत्तर देताना भगवान् विष्णूंनी चौदा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत. मात्र कलियुगांत औरस आणि दत्तक हे दोनच पुत्र शास्त्रसंमत आहेत. (*औरसो दत्तकश्चैव कलौ द्वावेव संमतौ। औरसो धर्मपत्नीज..*) जिवंतपणी औरस पुत्राचे मुखदर्शन पित्याचे ऋण फेडून त्याला मुक्ती देणारे असते असे ऐतरेय ब्राह्मणाचे (७:३:१) वचन आहे. तरी हे साध्वी, तुला या जन्मीच दोन तारक औरस पुत्र (एक कन्या आणि एक पुत्र) होतील. हे शोभने, हे तू केलेल्या माझ्या अर्चनाचेच फळ आहे यांत संशय नाही.'५४-५५.

**तथेत्युक्त्वापि सा गेहं गत्वा चक्रे यथोदितम् । निष्कलाप्यृतुमत्यासीन् निःसीममहिमा प्रभोः ।।५६।।**
**शुद्धूर्ध्वं सह पत्यैत्य सा प्रपूज्य गुरुं मुदा । गृहं गत्वा दधौ गर्भं तन्निशीशप्रसादतः ।।५७।।**
**स्वतन्त्रसंविद्भगवान् लीलां को वेत्ति यत्स्तुतौ । द्विसहस्ररसज्ञोऽपि कुण्ठितश्चकिता श्रुतिः ।।५८।।**
**वलीपलितवेपैर्यद्देहो विद्धो जराकृशः । साधत्त गर्भमित्यन्ये प्रशशंसुः परस्परम् ।।५९।।**
**तद्भर्ता सोमनाथस्तु प्रीत्या पुंसवनादिकाः । क्रिया व्यधात्क्रमात्पुत्रीं कालेऽसौषीत्ततः सती ।।६०।।**

सा अपि 'तथा' इति उक्त्वा गेहं गत्वा यथा उदितं चक्रे । (सा) निष्कला अपि ऋतुमति आसीन्। प्रभोः निःसीममहिमा।५६। सा शुद्धि+ऊर्ध्वं पत्या सह एत्य मुदा गुरुं प्रपूज्य गृहं गत्वा तत् निशि ईश+प्रसादात् गर्भं दधौ।५७। यत् स्तुतौ द्वि+सहस्र+रसज्ञः अपि कुण्ठितः, श्रुतिः चकितः, स्वतन्त्र+संवित् भगवान् (तस्य) लीलां कः वेत्ति?५८। अन्ये परस्परं प्रशशंसुः, 'यत् देहः वली+पलित+वेपैः विद्धः जरा+कृशः सा गर्भं आधत्त।'५९। तत् भर्ता सोमनाथः तु प्रीत्या क्रमात् पुंसवनादिकाः क्रिया व्यधात्। ततः काले सती पुत्रीं असौषीत्।६०।

श्रीगुरूंची आज्ञा मान्य करून ती घरी गेली आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे तिने ती फळे खाल्ली. श्रीगुरूंच्या अपार महिमेने ती गतार्तवा वृद्धाही ऋतुस्नात झाली.५६. चौथ्या दिवशी स्नान करून शुद्ध झाल्यावर ('*चतुर्थेऽह्नि शुद्ध्यति.*' पराशरस्मृति ७:१७) पाचव्या दिवशी ती पतीसह श्रीगुरूंकडे येऊन आनंदाने त्यांची पूजा करून घरी गेली. भगवंताच्या कृपाप्रसादाने त्याच रात्री तिला गर्भधारणा झाली.५७. ज्याची स्तुती करता करता शेषाला दोन हजार जिभाही पुरल्या नाहीत आणि वेदही चक्रावून गेले त्या अपराधीनबुद्धी भगवंताच्या लीला कुणाला तरी कळतील का?५८. सर्व लोक आश्चर्याने परस्परांना म्हणू लागले, 'जिचा देहावर वळ्या पडलेल्या आहेत, केस पांढरे झाले, अंगाला कांप आहे, वार्धक्याने देह कृश झालेला आहे, अशा म्हातारीला गर्भ राहिला!'५९. तेव्हा गंगेच्या पतीने, सोमनाथाने हौसेने क्रमशः पुंसवनादि शास्त्रविहित गर्भाचे संस्कार केले. मग त्या सतीने यथाकाल एका मुलीला जन्म दिला.६०.

**तदेयं कन्यका साध्वी सच्छीलगुणशालिनी । भविष्यति कुलोद्धर्त्री पुत्राढ्येत्याह दैववित् ।।६१।।**
**तच्छ्रुत्वा स द्विजेभ्योऽदादर्थवस्त्रादिकं द्विजः । प्रापतुर्द्वादशेऽह्नीशं कन्यामादाय दंपति ।।६२।।**
**तत्पादाब्जान्तिकं कन्यां संस्थाप्योचे प्रणम्य सा । संसृतिस्थजरद्वन्ध्य-द्रुमस्ते फलितो दृशा ।।६३।।**

तदा दैववित् 'इयं कन्यका साध्वी, सत्+शील+गुण+शालिनी कुल+उद्धर्त्री पुत्र+आढ्या भविष्यति' इति आह।६१। तत् श्रुत्वा सः द्विजः द्विजेभ्यो अर्थ+वस्त्र+आदिकं अदात्। द्वादशे अह्नि दंपति कन्यां आदाय ईशं प्रापतुः।६२। तत्+पाद+अब्ज+अन्तिकं कन्यां संस्थाप्य प्रणम्य सा ऊचे। 'ते दृशा संसृति+स्थ+जरत्+वन्ध्य+द्रुमः ते दृशा फलितः।६३।

तेव्हा ज्योतिष्यांनी जातक वर्तविले की, 'ही कन्या साध्वी, सुशील गुणवान्, कुळाचा उद्धार करणारी आणि पुत्रवती होईल.'६१. ते भाकीत ऐकून त्या सोमनाथ ब्राह्मणाने ब्राह्मणांना दक्षिणा, वस्त्रे इत्यादि दिले. बाराव्या दिवशी ते दोघे पतिपत्नी कन्येला घेऊन श्रीगुरूंकडे आले.६२. त्यांच्या चरणकमलांच्या सन्निध त्या कन्येला ठेवून उभयतांनी नमस्कार केला आणि ती गंगा श्रीगुरूंना म्हणाली, 'अहं-ममतेने संसारात स्थिरावलेला हा वठलेला आणि वांझ देहरूपी वृक्ष आपल्या कृपाकटाक्षाने फळला आहे.'६३.

फळांनी बहरलेला वृक्षसुद्धा त्याची फळे चांगली असली तरच वाटसरू त्याला स्वीकारतात. **सुफल** म्हणजे पुत्रवान असला तरच वाटसरू म्हणजे स्वर्गलोकाची अपेक्षा असलेले पूर्वज अंगीकारतात. ऐतरेय ब्राह्मणानुसार पुत्र हा प्रकाशरूप मक्ती देणारा असतो तर पुत्री ही कष्टदायिनी असते. अर्थात् संतान होऊनही ती कन्या असेल तर मोघफलच नाही का? त्यापेक्षा वन्ध्यत्व बरे! असा तिचा अभिप्राय दिसतो. 'प्रभो, आपण जाणताच' असंही ती म्हणते आहे. पण हा अर्थ गौणपक्षी आहे असे श्रीमहाराज म्हणतात.

**सेव्यते फलितोऽपि द्रुः पान्थैश्चेत्सुफलो वरम्। वन्ध्योऽपि मोघफलत इति भातीश वेत्सि तत् ॥६४॥**

फलितः अपि द्रुः सुफलः चेत् पान्थैः सेव्यते। मोघ+फलतः वन्ध्यः अपि वरं इति भाति। (हे) ईश तत् वेत्सि।'६४।

मुख्यार्थ पुढीलप्रमाणे आहे. श्रीगुरूंच्या उपासनेने शुद्धचित्त ब्राह्मणीला कन्येच्या गर्भ वाढवण्याचे आणि प्रसूतीचे जे कष्ट झाले त्यांनीच वैराग्य उत्पन्न झाले. त्यामुळेच ह्या संततीपासून प्राप्त होणारी सुखे आणि लोक घेऊन काय करायचे? आत्मा हाच आपला नित्य आणि परमानंदस्वरूप लोक आहे असा तिचा निश्चय झाला. त्या भूमिकेतून ती बोलत आहे. **संसृतिस्थ** म्हणजे मी आणि माझे ह्या बुद्धीने संसारांत स्थिर झालेल्या, **जरत्** म्हणजे वृद्ध, पुरुषत्वाने प्राप्त होणारा कर्माधिकार नसलेली म्हणून **वंध्यः**, कर्माचरणाला अयोग्य, अर्थात् कर्मफलरहित म्हणजे वांझ **वृक्ष**, म्हणजेच पंचभूतांच्या संघातात्मक देह; तो आपल्या कृपाकटाक्षाने **फलित** झाला म्हणजे विवेक उत्पन्न झाला; तो **सुफलित** म्हणजे मोक्षर्पयवसायी झाला तरच **पान्थैः** म्हणजे मुमुक्षूंनी अंगीकारला जातो; अन्यथा **मोघफलतो** स्र्वगादिलक्षण नाशिवंत भोगांचे फल असेल तर तो त्याज्य ठरतो. त्यापेक्षा पाप-पुण्यविरहित (*वंध्यत्वं वरं*) निष्फलताच बरी. इथे श्रीस्वामिमहाराजांनी भ.पू.पा. शंकरार्चायांनी कठोपनिषदांतील (२:३:१) '*ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख*' या मंत्रावरील भाष्यात केलेले समष्टिरूप आणि व्यष्टिरूप देहावरील रूपक दिले आहे. त्याचा भावार्थ असा -

'जन्म, जरा, मृत्यू, शोक आदि अनेक अनर्थांचा बनलेला; क्षणाक्षणाला रूप पालटणारा; माया, मृगजळ, आकाशांतील मेघांची गंधर्वनगरी यांसारख्या पाहता पाहता नष्ट होणाऱ्या स्वरूपाची; मृत्यूनंतर वृक्षाप्रमाणेच अभावात्मक; केळीच्या बुंध्यासारखा निःसार; पाखंड बुद्धीच्या शेकडो विकल्पांचे मूळ; तत्त्वाच्या जिज्ञासूंनी अनिर्धारित (अनिश्चित) 'इदं' तत्त्वस्वरूप; वेदांताने निश्चित केलेले परब्रह्म ज्याचे मूलसार (अधिष्ठान) आहे;

**तच्छ्रुत्वा सस्मितं कन्यामादायेशो जगाद तौ । शीलधीगुणपुत्राढ्या भवेत्साध्व्यखिलार्चिता ।।६५।।**

तत् श्रुत्वा ईशः सस्मितं कन्यां आदाय तौ जगाद। 'शील+धी+ गुण+पुत्र+आढ्या अखिल+अर्चिता साध्वी भवेत्।'६५।

अविद्या, काम, कर्म आणि अव्यक्त या बीजांपासून अंकुरणारा; परब्रह्मावेगळा, विज्ञान व क्रिया या शक्तिद्वयात्मक हिरण्यगर्भ ज्याचा अङ्कुर आहे; सर्व प्राणी आणि लिंगभेद या ज्याच्या फांद्या आहेत; तृष्णारूपी जलाच्या सिंचनाने ज्याला उग्र दर्प आहे; बुद्धी, इंद्रिय, विषय हेच ज्याची पालवी आहे; श्रुती, स्मृती, न्याय, विद्या, उपदेश ह्या ज्याच्या पाकळ्या आहेत; जो यज्ञ, दान, तप आदि कर्मरूपी फुलांनी बहरलेला आहे; सुख, दुःख, वेदना अशा अनेक रसांनी भरलेला; प्राण्यांच्या उपजीविकेच्या अनंत फळांनी लखडलेला; त्यांच्या तृष्णारूपी पाण्याच्या सिंचनाने ज्याच्या विस्तारलेल्या मुळ्या, एकमेकांत गुंतून जटिल आणि दृढ झाल्या आहेत; ब्रह्मादि पक्ष्यांनी सत्य आदि लोकांची घरटी ज्याच्यावर बांधली आहेत; प्राण्यांच्या सुखदुःखामुळे झालेल्या हर्ष-शोकांपासून प्रकटलेल्या नृत्य, गीत, वादन, क्रीडा, टाळ्या, हास्य, आक्रोश, रुदन, 'हा हा', 'सोड सोड' इत्यादि अनेक शब्दांच्या गदारोळाने झालेला क्षुब्धतम महाध्वनी; याचा उच्छेद केवळ वेदांतविहित ब्रह्मात्मदर्शनरूपी असंगशस्त्राने होतो.'६४. ते ऐकून श्रीगुरूंनी स्मितमुखाने त्या कन्येला उचलून घेतले आणि म्हणाले, 'ही शीलवती, बुद्धिमती, गुणवान्, पुत्रवती आणि सर्वांना पूज्य होईल.' इथे श्रीगुरूंनी आपल्या स्मिताने विवेकसंपन्न झालेल्या ब्राह्मणीवर आपली माया पसरली; कारण आधी दिलेल्या पुत्रप्राप्तीच्या आणि मुक्तीच्या वराचा अनुभव तिला द्यायचा होता.६५.

**कन्या लब्धोत्तमेयं वां पुत्रेच्छा चेद्भवेत्सुतः । मूर्खः शतायुर्वाल्पायुर्विद्वान्वां कतरः प्रियः ।।६६।।**
**सार्भो विद्वान् प्रियोऽल्पायुरपीत्यूचतुरप्युभौ । तथेत्युक्त्वा स सापत्यौ गमयामास तौ प्रभुः ।।६७।।**
**गर्भं साप्यल्पकालेन धृत्वासूत सुतं शुभम् । श्रद्धया निष्कलाप्येवं पुत्रौ लेभेऽथ किं वद ।।६८।।**
**विद्याविनयवान् भूत्वा पितृशुश्रूषणोद्यतः । धार्मिकः पञ्च पुत्रांस्तत्पुत्रो लब्ध्वामृतं ययौ ।।६९।।**
**कन्यापीशप्रसादात्सा दीक्षितस्य सती शुभा । भूत्वा गुरूक्तवद्ब्रह्म-वादिनी प्राप सद्गतिम् ।।७०।।**

'इयं उत्तमा कन्या लब्धा। वां पुत्र+इच्छा चेत् सुतः भवेत्। वां मूर्खः शतायुः, वा अल्पायुः विद्वान्, कतरः प्रियः?'।६६। 'अल्पायुः अपि स+अर्भः विद्वान् प्रियः।' इति उभौ ऊचतुः। 'तथा' इति उक्त्वा सः प्रभुः तौ स+अपत्यौ गमयामास।६७। सा अपि अल्पकालेन गर्भं धृत्वा शुभं सुतं असूत। एवं श्रद्धया निष्कला अपि पुत्रौ लेभे। अथ किं वद।६८। तत् पुत्रः धार्मिकः विद्या+विनयवान् भूत्वा पितृ+शुश्रूषण+उद्यतः पञ्च पुत्रान् लब्ध्वा अमृतं ययौ।६९। कन्या अपि ईश+प्रसादात् गुरु+उक्तवत् दीक्षितस्य शुभा सती ब्रह्मवादिनी भूत्वा सद्गतिं प्राप।७०।

'ही फार उत्तम कन्या तुम्हाला झाली. जर तुम्हाला मुलगा हवा असेल तर तोही होईल. तुम्हाला शतायुषी मूर्ख मुलगा आवडेल की अल्पायुषी पण विद्वान्?'६६. 'अल्पायुषी असला तरी आम्हाला विद्वान् आणि पुत्रवान् मुलगा आवडेल.' या त्यांच्या म्हणण्याला अनुमोदन देऊन त्या श्रीगुरूंनी त्यांची कन्येसहित पाठवणी केली.६७. 'अल्पकाळातच त्या गंगेने गर्भ धारण केला आणि छानशा मुलाला जन्म दिला. अशा रीतीने ऋतू गेलेला असतानाही श्रद्धेच्या बळावर त्या वृद्धेला दोन मुले लाभली. नामधारका, यापेक्षा श्रीगुरूंचे अधिक माहात्म्य काय सांगावे?'६८. त्यांचा तो मुलगा अत्यंत धार्मिक, विद्यावान् आणि विनयशील झाला. तो आईवडिलांच्या सेवेत तत्पर होता. त्याला पाच मुलगे झाल्यावर तो सद्गती पावला.६९. त्यांची ती गुणी कन्यासुद्धा श्रीगुरूंनी सांगितल्याप्रमाणे दीक्षिताची पत्नी आणि ब्रह्मवादिनी होऊन पतीसह सद्गती पावली. स्त्रियांना वेदपठणाचा अधिकार नसताना ती ब्रह्मवादिनी कशी झाली? या प्रश्नाचे उत्तर असे - उपनयनाभावी सांगशाखा वेदाच्या अध्ययनाचा अधिकार नसला, तरी दीक्षिताच्या पत्नीला मंत्रपाठ आणि श्रवणाचा अधिकार आहे.७०.

**एवं गुरुप्रभावोऽयं श्रद्धादृष्ट्यैव दृश्यते । सद्भक्तैर्न त्वभक्तैः स जन्मान्धैरिव भास्करः ॥७१॥**
**दण्डकुण्डीकरं शान्तं काषायाच्छादनं सदा । ध्यायन्तौ यतिरूपं तं दम्पती मुक्तिमापतुः ॥७२॥**
**श्रद्धाभक्त्यैव सुलभा गुरुवाक्यानुवर्तिनाम् । उभयी सिद्धिरप्यन्यच्चित्रं तच्चेष्टितं शृणु ॥७३॥**
**तत्रैत्य नरहर्याख्यो विप्रः कुष्ठी जगद्गुरुम् । प्रणतः शरणं प्राप्य प्रावोचद् गद्गदाक्षरः ॥७४॥**
**हरे शम्भो परानन्द-मूर्ते जय जयाच्युत । भक्तवत्सल ते कीर्तिं श्रुत्वात्राप्तोऽस्मि सद्गुरो ॥७५॥**

एवं गुरु+प्रभावः। अयं श्रद्धा+दृष्ट्या एव सत्+भक्तैः दृश्यते। सः तु न अभक्तैः (दृश्यते) जन्मांधैः भास्कर इव।७१। दण्ड+कुण्डी+करं शान्तं काषाय+आच्छादनं यतिरूपं तं सदा ध्यायन्तं दम्पती मुक्तिं आपतुः।७२। गुरु+वाक्य+अनुवर्तिनां श्रद्धा+भक्त्या एव उभयी सिद्धिः सुलभा। अन्यत् अपि चित्रं तत् चेष्टितं शृणु।७३। तत्र नरहरि+आख्यः कुष्ठी विप्रः एत्य जगत्+गुरुं प्रणतं शरणं प्राप्य गद्गद+अक्षरः प्रावोचत्।७४। '(हे) हरे, शम्भो, परानन्द+मूर्ते, अच्युत, भक्त+वत्सल, सद्गुरो, जय, जय। ते कीर्तिं श्रुत्वा अत्र आप्तः अस्मि।'७५।

असा हा श्रीगुरूंचा प्रभाव आहे. मात्र श्रद्धारूपी दृष्टी असलेल्या सद्भक्तांनाच तो दिसतो. जन्मांधाला जसा सूर्य दिसत नाही, तसा अभक्तांना सद्गुरुमहिमा दिसत नाही. **श्रद्धा म्हणजे गुरू आणि शास्त्र यांनी उपदेशिलेल्या तत्त्वांवर आणि त्यांच्या प्राप्तीच्या उपायांवर परम विश्वास**.७१. एका हातात दंड आणि एका हातात कमंडलु धारण केलेल्या, भगवी छाटी पांघरलेल्या त्या यतिरूप सद्गुरूंचे निरंतर ध्यान करीत ते सोमनाथ आणि गंगा हे जोडपे मुक्त झाले.७२. गुरुवाक्याला अनुसरणाऱ्यांना श्रद्धायुक्त भक्तीनेच ऐहिक आणि पारलौकिक अशी दुहेरी सिद्धी सुलभ असते. आता श्रीगुरूंची आणखी एक अद्भुत लीला ऐक.७३. तिथे गाणगापुरी एक नरहरी नावाचा कुष्ठी ब्राह्मण आला. त्याने सद्गुरूंना शरण जाऊन त्यांना साष्टांग नमस्कार केला आणि गहिवरलेल्या कंठाने आपली हकीकत सांगितली.७४. सद्गुरूंना लावलेली संबोधने हेतुगर्भ आहेत. हरी म्हणजे पाप हरण करणारा. शंभू म्हणजे आरोग्य देणारा. तसेच परानंदमूर्ती म्हणजे मोक्षदाता. भक्तवत्सल या नावाने त्यांच्या कृपेला आवाहन केले आहे. नरहरी म्हणतो, 'सद्गुरुमहाराज मी आपली कीर्ती ऐकून इथे आलो आहे.'७५.

**यजुर्विदोऽपि मे तुण्डं केऽपि नेक्षन्ति कुष्ठिनः । तीर्थार्चनजपैः कुष्ठं तन्मे नापैत्यघात्मनः ।।७६।।**
**कृपया तेऽपयायात् तदिति मत्वागतोऽस्म्यहम् । नास्ति चेत्तत्प्रतीकारः शंसाग्रेऽसूंस्त्यजामि ते ।।७७।।**
**तच्छ्रुत्वा प्राक्तनाघोत्थं कुष्ठं नश्येदिति प्रभुः । प्रोक्त्वा शुष्कौदुम्बरैधो दृष्ट्वावोचत्सकुष्ठिनम् ।।७८।।**
**मद्वाक्ये भक्तिमांश्चेत् तत्काष्ठमारोप्य सङ्गमे । भज पल्लविते तस्मिन्छुद्धोऽकुष्ठो भविष्यसि ।।७९।।**
**ओमित्युक्त्वा तदारोप्य श्रद्धाभक्त्या स सङ्गमे । भेजे दत्वाधारबन्धं परितोऽम्बुनिषेचनैः ।।८०।।**

'यजुः+विदः अपि मे कुष्ठिनः के अपि तुण्डं न पश्यति। मे अघ+आत्मनः तत् कुष्ठं न अपैति।'७६। 'ते कृपया तत् अपयायात् इति मत्वा अहं आगतः अस्मि। तत् प्रतीकारः नास्ति चेत् शंस, ते अग्रे असून् त्यजामि।'७७। तत् श्रुत्वा प्रभुः 'प्राक्तन+अघ+उत्थं कुष्ठं नश्येत्' इति प्रोक्त्वा शुष्क+औदुम्बर+एधः दृष्ट्वा सः कुष्ठिनं अवोचत्।७८। 'मत्+वाक्ये भक्तिमान् चेत् तत् काष्ठ सङ्गमे आरोप्य भज। तस्मिन् पल्लविते शुद्धः अकुष्ठः भविष्यसि।'७९। 'ॐ' इति उक्त्वा सः श्रद्धा+भक्त्या तत् सङ्गमे आरोप्य, आधार+बन्धं दत्वा, परितः अम्बु+निषेचनैः भेजे।८०।

'मी यजुर्वेद जाणणारा ब्राह्मण असूनही कुष्ठी म्हणून कुणी माझे तोंडसुद्धा पाहात नाहीत. ते कुष्ठ घालविण्यासाठी तीर्थयात्रा, अनेक देवांच्या पूजा आणि जपादिक खूप प्रयत्न केले. पण माझ्या पापाविष्ट देहाची शुद्धी होत नाही.'७६. 'आपल्या कृपेने त्याचा परिहार होईल अशा आशेने मी आलो आहे. जर त्याचा कांही प्रतिकारच नसेल तर तसे सांगा, मी इथेच आपल्या समोर प्रायोपवेशनाने प्राणत्याग करतो.'७७. त्याचे ते बोलणे ऐकून श्रीगुरू म्हणाले, 'पूर्वकर्मांच्या पापामुळे उद्भवलेले हे कुष्ठ नष्ट होईल.' समोर एक औदुंबराचे वाळलेले लाकूड पाहून ते त्या कुष्ठग्रस्ताला म्हणाले.७८. 'माझ्या वाक्यावर तुझी श्रद्धा असेल तर हे लाकूड घेऊन संगमावर लाव आणि त्याला पाणी घालणे इत्यादी सेवा कर. त्या लाकडाला पालवी फुटली की तू शुद्ध होशील आणि तुझे कुष्ठ नाहीसे होईल.'७९. 'ॐ' असे म्हणून ते मान्य करीत त्याने ते वाळलेले लाकूड संगमावर नेऊन तिथे त्याचे आरोपण केले, त्याला आधार देऊन व आळे करून त्याला पाणी घालून त्याची श्रद्धा व भक्तीपूर्वक उपवास करीत सेवा आरंभली.८०.

**कृपाऽस्य सद्यस्तव शुद्ध्यभावादुक्तं फलं कष्टमिदं कुतोऽस्मिन् ।**
**शंकाकुरस्यात इदं त्यजेति जनैर्निषिद्धोऽप्यभजत्सदेध्मम् ।।८१।।**
**तदैत्य ते गुरुं प्राहुर्भवद्वाक्याद्द्विजो जरत् । भजतीध्मं बोधय तं मरिष्यत्युपवासतः।।८२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**करोति साधु तद्विप्रो दृढभक्त्या तरिष्यति । भक्तिर्हि तारकात्रैव भवसिन्धुनिमज्जतः ।।८३।।**
**मन्त्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भि(भे)षजे गुरौ । यादृशी भावना यस्य तस्य सिद्धिस्तु तादृशी ।।८४।।**

'अस्य कृपा सद्यः। तव शुद्धि+अभावात् इदं कष्टं फलं उक्तम्। अस्मिन् अङ्कुरस्य शङ्का कुतः? इदं त्यज।' इति जनैः निषिद्धः अपि (द्विजः) सदा इध्मं अभजत्।८१। तदा ते गुरुं एत्य प्राहुः, 'भवत् वाक्यात् द्विजः जरत् इध्मं भजति। तं बोधय। (अन्यथा) उपवासतः मरिष्यति।'८२। श्रीगुरुः उवाच। तत् विप्रः साधु करोति। दृढ भक्त्या तरिष्यति। अत्र भव+सिन्धु+निमज्जतः भक्तिः एव तारका हि।८३। मन्त्रे, तीर्थे, द्विजे, देवे, दैवज्ञे, भिषजे, गुरौ यस्य यादृशी भावना तस्य तु तादृशी सिद्धिः।८४।

त्याने चालवलेली ती काष्ठसेवा पाहून त्याची दया येऊन कांही लोक त्याला म्हणाले, 'आमच्या श्रीगुरूंची दर्शनमात्रे कृपा होते. तुझ्या पापाला निष्कृती नसेल म्हणून हे कष्टरूपी पापनाशक फळ तुला सांगितले आहे. या वाळून कोळ झालेल्या लाकडाला अंकुर फुटण्याची शंका तरी आहे का? तू हा व्यर्थ खटाटोप सोड.' लोकांनी अनेक वेळा समजावूनही तो ब्राह्मण मात्र त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्या काष्ठाची सेवा करीत राहिला.८१. तेव्हा ते लोक श्रीगुरूंकडे गेले आणि म्हणाले, 'आपल्या वचनानुसार तो कुष्ठी ब्राह्मण खरोखरच ते वाळलेले लाकूड रोपून त्याला पाणी घालतो आहे. त्याला आपणच समजावून सांगा. नाहीतर उपवासांनी तो मरायचा!'८२. श्रीगुरू त्यांना म्हणाले, 'तो ब्राह्मण उत्तमच करतो आहे. त्याच्या ह्या दृढ भक्तीने तो तरून जाईल. जितका भाव दृढ असेल तितकेच फलही निश्चित मिळते. ह्या भूलोकात संसारसागरात बुडणाऱ्याला भक्तीच खरोखर तारून नेते. मंत्र, तीर्थ, ब्राह्मण, देव, ज्योतिषी, वैद्य (किंवा औषध) तसेच गुरू यांच्याविषयी ज्याची जशी भावना असेल त्याप्रमाणेच फळ मिळते.'८४.

**वच्मि सूतर्षिसंवादं प्राग्वृत्तं दृढभक्तिदम् । ऋषीन्सूतो जगादेदं सिंहकेतुनृपात्मजः ।।८५।।**
**धनञ्जयाख्यः पाञ्चाल एकदा वनमभ्यगात् । दृष्ट्वा स मृगयाश्रान्तस् तत्र जीर्णं शिवालयम् ।।८६।।**
**तस्थौ तत्र क्षणं साकं शबरेणानुयायिना । दृष्ट्वा लिङ्गानि रम्याणि दूतः प्राह नृपं गृहे ।।८७।।**
**लिङ्गं नीत्वा पूजयितुं कांक्षेऽज्ञोऽस्म्यनुशाधि माम् । यदाज्ञापयसे देव दृढभक्त्या करोमि तत् ।।८८।।**

**।। राजपुत्र उवाच ।।**

**संस्थाप्य सत्स्थले लिङ्गं शुचिर्भूत्वा स्त्रियान्वितः । भक्त्या पूजय मत्वेशमुपचारैर्यथाविधि ।।८९।।**

दृढभक्तिदं प्राक् वृत्तं सूत+ऋषि+संवादं वच्मि। सूतः ऋषीन् इदं जगाद। पाञ्चाले सिंहकेतु+नृप+आत्मजः धनंजय+आख्यः एकदा वनं अभ्यगात्। तत्र सः मृगया श्रान्तः जीर्णं शिव+आलयं दृष्ट्वा तत्र शबरेण अनुयायिना साकं क्षणं तस्थौ। दूतः रम्याणि लिङ्गानि दृष्ट्वा नृपं प्राह। 'लिङ्गं गृहे नीत्वा पूजयितुं काङ्क्षे। अज्ञः अस्मि। मां अनुशाधि। (हे) देव यत् आज्ञापयसे तत् दृढभक्त्या करोमि।'८५-८८। राजपुत्र उवाच। 'लिङ्गं सत्स्थले संस्थाप्य शुचिः भूत्वा स्त्रिया+अन्वितः ईशं मत्वा भक्त्या यथाविधि उपचारैः पूजय।'८९।

श्रीगुरू त्या लोकांना पुढे म्हणतात, 'पूर्वीची एक घडलेली गोष्ट सूत आणि शौनकादि ऋषींच्या संवादरूप तुम्हाला सांगतो. सूतांनी ऋषींना सांगितले. पांचाल देशात सिंहकेतू राजाचा धनंजय नावाचा मुलगा वनात शिकारीसाठी गेला होता. मार्गात थकल्यामुळे तो आपल्या बरोबर असलेल्या भिल्ल चाकरासह एका जुन्या शिवमंदिराजवळ किंचित् काळ थांबला. त्या भिल्ल नोकराने तिथे पडलेली अनेक सुंदर लिंगे पाहिली आणि तो राजपुत्राला म्हणाला, 'महाराज यातील एखादे लिंग नेऊन घरी त्याची पूजा करावी अशी मला इच्छा होत आहे. पण मी अज्ञानी आहे. पूजा कशी करायची वगैरे मला माहीत नाही. गुरुदेवा, आपणच मला उपदेश करावा. आपण जशी आज्ञा कराल तसे मी सर्व दृढ भक्तीने करीन.'८८. राजपुत्राने त्याला सांगितले, 'ते लिंग चांगल्या पवित्र स्थळी ठेवावे. स्नानादींनी शुद्ध होऊन स्त्रीसह ते लिंग म्हणजे प्रत्यक्ष भगवान् शंकर आहेत अशी भावना करून भक्तीपूर्वक यथाविधी उपचारांनी पूजा करावी.'८९.

**चिताभस्मान्वहं देयं दत्तान्नं भुङ्क्ष्व भार्यया । प्रसादबुद्ध्येत्युक्त्वा स पूजाविधिमुपादिशत् ।।९०।।**
**सोऽपि तुष्टो गृहीत्वैकं लिङ्गं गत्वा गृहं स्त्रिया । भेजे यथोपदेशं तद् भस्मादात्प्रत्यहं मुदा ।।९१।।**
**भस्मैकस्मिन्दिने क्वापि न लेभेऽभूत्स दुर्मनाः । तद्भार्या प्राह मां दग्ध्वा शम्भवेऽर्पय भस्म तत् ।।९२।।**
**शरीरं कृमिविड्भस्म-रूपान्तं क्षणभङ्गुरम् । तत्साफल्यं कुरु हरे भस्मार्पणनिमित्ततः ।।९३।।**

'अनु+अहं चिता+भस्मं देयम्। दत्त+अन्नं प्रसाद+बुद्ध्या भार्यया भुङ्क्ष्व।' इति उक्त्वा सः पूजाविधिं उपादिशत्। ९०। सः अपि तुष्टः लिङ्गं गृहीत्वा गृहं गत्वा तत् स्त्रिया यथा+उपदेशं भेजे। प्रति अहं मुदा भस्म अदात्।९१। एकस्मिन् दिने क्व अपि भस्म न लेभे। सः दुर्मनाः अभूत्। तत्+भार्या प्राह, 'मां दग्ध्वा तत् भस्म शम्भवे अर्पय।'९२। कृमि+विट्+भस्म+रूप+अन्तं क्षणभङ्गुरं शरीरं हरे भस्म+अर्पण+निमित्ततः तत् साफल्यं कुरु।

'रोज त्याला चिताभस्म द्यावे. त्याला नैवेद्य दाखविलेले अन्न प्रसाद मानून पत्नीसह भक्षण करावा.' असे सांगून राजपुत्राने त्याला पूजेचा विधी समजावून सांगितला.९०. तो शबर प्रसन्न चित्ताने लिंग घेऊन घरी गेला आणि राजपुत्राच्या उपदेशानुसार स्त्रीसह त्याची पूजा करू लागला. रोज आनंदाने तो लिंगासाठी चिताभस्म आणीत असे. एके दिवशी खूप शोधूनही कुठेच चिताभस्म मिळाले नाही. तेव्हा तो अत्यंत खिन्न झालेला पाहून त्याची पत्नी म्हणाली, 'तुम्ही मलाच जाळून ते भस्म भगवान् शंकरांना अर्पण करा.'९२. 'हया क्षणभंगूर नाशिवंत शरीराचे शेवटी कृमी, विष्ठा, भस्म यांच्यातच परिवर्तन होणार आहे. शिवाला भस्म देण्यासाठी याचा विनियोग करून त्याचे साफल्य करा.'९३.

## ।। शबर उवाच ।।

**तिष्ठत्स्विनक्ष्माग्निषु साक्षिषु प्रिये भर्तृत्वमाश्रुत्य वृतास्यदोऽन्यथा ।**
**कुर्यां कथं तन्वि किशोरि बालिके भो साध्व्यलब्धैहिकसौख्य उत्तमे ।।९४।।**
**सा प्राह मोहो वितथोऽयमध्रुवे येन ध्रुवं साहजिकं प्रसाध्यते ।**
**तत्साधयास्मिन्परकीयकल्पना नास्त्येव तेऽर्धाङ्गविभाग्यदो वपुः ।।९५।।**
**प्रोक्ते सुयुक्ते प्रियया तथेत्यसौ प्रोक्त्वा गृहे तामवरुद्ध्य सालयाम् ।**
**दग्ध्वार्पयद्भस्म शिवाय नित्यवद् भ्रान्त्या प्रसादक्षण आह्वयत्प्रियाम् ।।९६।।**

'(हे) प्रिये इन+क्ष्मा+अग्निषु तिष्ठत्सु भर्तृत्वं आश्रुत्य वृता असि। भो किशोरि, तन्वि बालिके साध्वि, अलब्ध+ऐहिक+सौख्ये, उत्तमे, अदः अन्यथा कथं कुर्याम्?'।९४। सा प्राह। 'अयं अध्रुवे वितथः मोहः। येन साहजिकं ध्रुवं प्रसाध्यते तत् साधय। अस्मिन् देहे परकीय कल्पना नास्ति एव। अदः वपुः ते अर्ध+अङ्ग+विभागी।'९५। प्रियया सुयुक्ते प्रोक्ते 'तथा' इति असौ प्रोक्त्वा तां गृहे अवरुद्ध्य स+आलयां दग्ध्वा (तत्) भस्म नित्यवत् शिवाय अर्पयत्। प्रसाद+क्षणे भ्रान्त्या प्रियां आह्वयत्।९६।

तिचा तो आग्रह पाहून तो शबर तिला म्हणाला, 'प्रिये सूर्य, भूमी आणि अग्नी यांच्या साक्षीने तुझा पोशिंदा, रक्षणकर्ता म्हणून मी तुझा अंगीकार केला आहे. हे असे विपरीत कृत्य मी कसे करू? तुझ्यासारख्या कोवळ्या वयाच्या सुंदर तरुणीची, जिने अजून पुत्रादि संसारसुखाचा अनुभवही घेतलेला नाही, मी कशी हत्या करू शकेन?'९४. ती शबरी म्हणाली, 'ह्या नाशिवंत शरीराचा हा मिथ्या मोह आहे. ज्याने चिरंतन स्वरूपाची प्राप्ती होईल असे कांही करा. शिवाय ह्या शरीराविषयीचे परकेपण मनातून काढून टाका. हे घटाप्रमाणे इंद्रियगोचर स्थूल शरीर तुमचे हक्काचे अर्धांग आहे.' आपल्या पत्नीचे ते सयुक्तिक बोलणे त्याला पटले. 'ठीक तर! तसेच करतो,' असे म्हणून त्याने तिला घरात कोंडून घातले आणि घरासहित तिला जाळून टाकले. मग ते भस्म घेऊन नित्याप्रमाणे पूजा केली. प्रसाद घेताना नेहमीच्या संवयीने त्याने आपल्या प्रिय पत्नीला हाक मारली.९६.

**दग्धापि साह्वानत आप पूर्ववत् तां सद्म चालोक्य स शङ्कितोऽब्रवीत् ।**
**दग्धापि गेहेन सहागता कथं सुप्तोत्थितास्मीति शबर्युवाच तम् ।।९७।।**
**शम्भुप्रभावोऽस्त्विवति तेन भाषिते द्राक्प्रादुरासीन्निजरूपधृक् शिवः ।**
**दौष्कुल्यदोषं परिहृत्य दर्शनात् ताभ्यां शिवोऽदादुभयत्र काङ्क्षितम् ।।९८।।**
**भक्तेः प्रभावोऽयमियान्न किञ्चित् फलत्यृते भक्तिमतोऽस्य सिद्ध्येत् ।**
**भक्त्येष्टमित्याह स तान्कदाचिद् गच्छन्प्रभुः स्नातुममुं ददर्श ।।९९।।**

सा दग्धा अपि आह्वानतः पूर्ववत् आप। तां, सद्मं च आलोक्य सः शङ्कितः अब्रवीत्। 'गेहेन सह दग्धा अपि कथं आगता?' शबरी तं उवाच, 'सुप्ता उत्थिता अस्मि' इति।९७। 'शम्भु+प्रभावः अस्तु' इति तेन भाषिते, द्राक् शिवः निज+रूप+धृक् प्रादुरासीत्। दर्शनात् दौष्कुल्य+दोषं परिहृत्य ताभ्यां शिवः उभयत्र काङ्क्षितं अदात्।९८। 'अयं इयान् भक्तेः प्रभावम्। भक्तिं ऋते किञ्चित् (अपि) न फलति। अतः अस्य भक्त्या इष्टं सिद्ध्येत्' इति सः तान् आह। कदाचित् प्रभुः स्नातुं गच्छन् अमुं ददर्श।९९।

ती जळून गेलेली असूनही हाकेसरशी आली. तिला पाहून चकित झालेल्या शबराने पाहिले तर घरही पूर्ववत् झालेले. त्याने आश्चर्याने तिला विचारले, 'तू तर जळाली होतीस, मग कशी आलीस?' ती उत्तरली, 'मी तर झोपले होते. तुमच्या हाकेने जागी झाले.'९७. 'ही त्या शंभूचीच कृपा,' असे तो शबर म्हणत असतानाच भगवान् शंकर आपल्या सगुण रूपाने प्रकट झाले. आपल्या दर्शनाने त्यांनी त्या दंपतीचा कुलहीनतेचा दोष दूर केला आणि त्यांना ऐहिक आणि पारलौकिक वैभव अर्पण केले.९८. श्रीगुरू म्हणतात, 'हा असा भक्तीचा प्रभाव आहे! भक्तीविना किंचित् सुद्धा फळ लाभत नाही. म्हणून ह्या ब्राह्मणाचे इष्ट त्याला त्याच्या भक्तीनेच मिळेल,' असे त्या लोकांना त्यांनी सांगितले. पुढे एकदां श्रीगुरू स्नानासाठी संगमावर जात असता त्यांनी त्या ब्राह्मणाला पाहिले.९९.

**तं तादृशं प्रेक्ष्य कमण्डलुस्थ-क्षीरेण तत्प्रोक्ष्य स शुष्ककाष्ठम् ।**
**ददर्श सद्दिव्यदृशा तदेध्मे सद्योङ्कुरा भूरिश आविरासन् ।।१००।।**
**दिव्यं स्वधामाङ्कुरितं च काष्ठमदृष्टकुष्ठोऽग्रत आस्थितं तम् ।**
**दृष्ट्वा स काष्ठार्पितदृष्टिमीशं तुष्टाव सत्प्रेमभरानताङ्गः ।।१०१।।**

तादृशं तं प्रेक्ष्य सः कमण्डलुस्थ क्षीरेण तत् शुष्क+काष्ठं प्रोक्ष्य सत+्दिव्य+दृशा ददर्श। तदा इध्मे भूरिशः अङ्कुराः आविरासन्।१००। अदृष्ट+कुष्ठः,दिव्यं स्वधाम, अङ्कुरितं च काष्ठं, अग्रतः आस्थितं तं दृष्ट्वा सः ॑ सत्+प्रेम+भर+आनत+अङ्गः काष्ठ+अर्पित+दृष्टिं ईशं तुष्टाव।१०१।

त्याला तसे दृढ भक्तीने लाकडाला पाणी घालताना पाहून श्रीगुरूंनी आपल्या कमं डलूतले पाणी त्या सुक्या लाकडावर शिंपडले आणि आपल्या संजीवन दिव्यदृष्टीने पाहिले. तो काय, ते काष्ठ भरपूर पालवीने बहरून गेलेले!१००.

त्याच वेळी त्या ब्राह्मणाचे कुष्ठ निघून गेले आणि त्याचा देह सुवर्ण झाला. ती औदुंबराची कोवळी पाने आणि आपली कांतियुक्त काया पाहून आनंदाने, कृतज्ञतेने आणि सात्त्विक प्रेमभराने झुकलेल्या देहाने नरहरी सद्गदित कंठाने काष्ठावर दृष्टी असलेल्या श्रीगुरूंना उद्देशून पुढील उत्स्फूर्त स्तोत्र गाऊ लागला (हे उपजाती वृत्तांतील अष्टक आहे).१०१.

**कोट्यर्कभं कोटिसुचन्द्रशान्तं विश्वाश्रयं देवगणार्चिताङ्घ्रिम् ।**
**भक्तप्रियं त्वात्रिसुतं वरेण्यं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०२।।**
**मायातमोऽर्कं विगुणं गुणाढ्यं श्रीवल्लभं स्वीकृतभिक्षुवेषम् ।**
**सद्भक्तसेव्यं वरदं वरिष्ठं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०३।।**

कोटि+अर्क+भं कोटि+सुचन्द्र+शान्तं विश्व+आश्रयं देव+गण+अर्चित+अङ्घ्रिं भक्त+प्रियं वरेण्यं त्वां अत्रिसुतं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।२। माया+तमः अर्कं, विगुणं गुण+आढ्यं, श्रीवल्लभं, स्वीकृत+भिक्षु+वेषं, सत्+भक्त+सेव्यं, वरदं वरिष्ठं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।३।

कोटी सूर्यांसारखा तेजस्वी असूनही जो कोटी चंद्राप्रमाणे शांत (आल्हादक) आहे, ज्याच्या अधिष्ठानावर हे विश्व स्थिरावले आहे, देवांचे समूह ज्याच्या चरणांची पूजा करीत आहेत, भक्तांना प्रिय असणाऱ्या, निरतिशयानंदरूप, साक्षात् अत्रिनंदन दत्तात्रेयच अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!२. विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत (६:१२५) सांगितल्याप्रमाणे तमोरूप असलेल्या मायेचा (*माया चेयं तमोरूपा*) निरास करणारा जो सूर्य आहे, सर्व गुणांचा आकर असूनही जो गुणातीत आहे, प्रत्यक्ष लक्ष्मीचा पती असूनही ज्याने संन्यासी वेष धारण केला आहे, सद्भक्तांना सेवनीय अशा वरदात्या श्रेष्ठ नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!३.

**कामादिषण्मत्तगजाङ्कुशं त्वामानन्दकन्दं परतत्त्वरूपम् ।**
**सद्धर्मगुप्त्यै विधृतावतारं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०४।।**
**सूर्येन्दुगुं सज्जनकामधेनुं मृषोद्यपञ्चात्मकविश्वमस्मात् ।**
**उदेति यस्मिन्रमतेऽस्तमेति वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०५।।**
**रक्ताब्जपत्रायतकान्तनेत्रं सद्दण्डकुण्डीपरिहापिताघम् ।**
**श्रितस्मितज्योत्स्नमुखेन्दुशोभं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०६।।**

कामादि+षट्+मत्त+गज+अङ्कुशं आनन्द+कन्दं पर+तत्त्व+रूपं, सत्+धर्म+गुप्त्यै विधृत+अवतारं, त्वां वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।४। सूर्य+इन्दु+गुं, सत्+जन+काम+धेनुं, मृषोद्य+पञ्चात्मक+विश्वं अस्मात् उदेति, यस्मिन् रमते, अस्तं एति वन्दे, (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।५। रक्त+अब्ज+पत्र+आयत+कान्त+नेत्रं, सत्+दण्ड+कुण्डी+परिहापित+अघं, श्रित+स्मित+ज्योत्स्न+मुख+इन्दु+शोभं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।६।

काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर या माजलेल्या हत्तींना आवरणारा अंकुश असा आनंदाचा कंद - म्हणजेच आनंदवल्लीत वर्णिलेल्या मानुष आनंदापासून प्रजापतीच्या आनंदापर्यंतच्या सर्व आनंदांचा स्रोत (*यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसत।* ऋग्वेद संहिता ९:११३:११), परमतत्त्वस्वरूप निरुपाधिक ब्रह्मस्वरूपी, साधू आणि धर्म यांच्या रक्षणाकरिता अवतरलेल्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!४. सूर्य आणि चंद्र ज्याचे डोळे आहेत, सद्भक्तांसाठी जो कामधेनू आहे, हे मिथ्याभूत पाचभौतिक जग ज्या अभिन्ननिमित्तोपादान कारणापासून, दोरीवर सर्प भासावा, तसे उगवते, ज्याच्यात विलसते आणि ज्याच्यात पुनः पाण्यात बुडबुडे विरावे तसे मावळते त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!५. लाल कमळाच्या पानासारखे आकर्ण विशाल नेत्र असलेल्या, आपल्या सात्त्विक दंड आणि कमंडलू यांनी भक्तांची पापे पळवून लावणाऱ्या, ज्याचा मुखचंद्रमा स्मितरूपी चांदण्याने उजळला आहे अशा नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!६.

**नित्यं त्रयीमृग्यपदाब्जधूलिं निनादसद्बिन्दुकलास्वरूपं ।**
**त्रितापतप्ताश्रितकल्पवृक्षं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०७।।**
**दैन्याधिभीकष्टदवाग्निमीड्यं योगाष्टकज्ञानसमर्पणोत्कम् ।**
**कृष्णानदीपञ्चसरिद्युतिस्थं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०८।।**
**अनादिमध्यान्तमनन्तशक्तिमतर्क्यभावं परमात्मसंज्ञं ।**
**व्यतीतवाग्हृत्पथमद्वितीयं वन्दे नृसिंहेश्वर पाहि मां त्वम् ।।१०९।।**

नित्यं त्रयी+मृग्य+पद+अब्ज+धूलिं, निनाद+सत+्बिन्दु+कला+स्वरूपं, त्रि+ताप+तप्त+आश्रित+कल्पवृक्षं, वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।७। दैन्य+आधि+भी+कष्ट+दव+अग्निं, ईड्यं, योग+अष्टक+ज्ञान+समर्पण+उत्कं, कृष्णा+पञ्च+सरित्+युति+स्थं वन्दे। (हे)नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।८। अन्+आदि+मध्य+अन्तं, अनन्त+शक्तिं अतर्क्य+भावं, परमात्म+संज्ञं, व्यतीत+वाक्+हृत्+पथं, अद्वितीयं वन्दे। (हे) नृसिंह+ईश्वर त्वं मां पाहि।१०९।

वेदांची त्रयी (ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद) सतत ज्या नित्य पुरुषाच्या चरणकमलांच्या धुळीचा मागोवा घेत असते (पण जिला ती गवसत नाही), नाद, बिन्दू आणि कला या स्वरूपांत योगिजन ज्याचे ध्यान करतात, संसाराच्या आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक तापांनी पोळलेले ज्या कल्पवृक्षाचा आसरा घेतात त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०७. जो दारिद्र्य, मनस्ताप, भय आणि क्लेश यांच्या वनांना जाळणारा अग्नी आहे, जो सर्वांना स्तुत्य आहे, जो (भक्तांना, साधकांना आणि यतींना) अष्टांग योगाचे ज्ञान समर्पण करण्यास सदैव उत्सुक असतो, अशा कृष्णा आणि पंचनदी यांच्या संगमावर निवसणाऱ्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर!१०८. ज्याला ना आदि आहे, ना मध्य ना अंत, ज्याच्या सामर्थ्याला सीमाच नाही, ज्याचा भाव (अभिप्राय) अतर्क्य आहे, ज्याला परमात्मा म्हणतात आणि जो वाचा आणि मन आणि यांच्या आवाक्याबाहेर आहे त्या नृसिंहदेवा तुला माझा नमस्कार! माझे अविद्या, काम आणि कर्म यांपासून रक्षण कर! **वाग्हृत्पथम्** याऐवजी **वाग्दृक्पथम्** असाही पाठ आहे.१०९.

**स्तोत्रे क्व ते मेऽस्त्युरुगाय शक्तिश् चतुर्मुखो वै विमुखोऽत्र जातः ।**
**स्तुवन्द्विजिह्वोऽभवदीश्वर त्वां सहस्रवक्त्रश्चकितोऽपि वेदः ।।११०।।**
**स्तुत्वैवं प्रणतीश्चक्रे तमाश्वास्याब्रवीद्विभुः । मत्प्रसादान्महत्त्वश्री-कीर्तिसत्पुत्रवान्भव ।।१११।।**
**शिष्योत्तम त्वं योगज्ञो भविष्यसि कुलं च ते । त्वद्वद्भविष्यत्यानीय वधूं तिष्ठ ध्रुवं त्विह ।।११२।।**
**तथेत्युक्त्वा द्विजो भार्यामानीय स तया सह । तत्र तस्थौ ततो लेभे पुत्रान्पुत्रीं स सत्तमान् ।।११३।।**
**विद्यासरस्वतीमन्त्रं गुरुदत्तं जपन्वरम् । भेजे गुरुं भवासक्तो जीवन्मुक्तोऽभवद् द्विजः ।।११४।।**

(हे) उरु+गाय ते स्तोत्रे मे क्व शक्तिः? अत्र चतुर्मुखः वै विमुखः जातः। (हे) ईश्वर, त्वां स्तुवन् सहस्र+वक्त्रः द्वि+जिव्हः अभवत्। वेदः अपि चकितः।११०। एवं स्तुत्वा प्रणतीः चक्रे। विभुः तं आश्वास्य अब्रवीत्। 'मत् प्रसादात् महत्त्व+श्री+कीर्ति+सत्पुत्र+वान् भव। (हे) शिष्य+उत्तम, त्वं योगज्ञः भविष्यसि। ते कुलं च त्वत्+वत् भविष्यति। वधूं आनीय इह तु ध्रुवं तिष्ठ।'१११-१२। द्विजः 'तथा' इति उक्त्वा भार्यां आनीय तया सह सः तत्र तस्थौ। ततः सः सत्तमान् पुत्रान् पुत्रीन् लेभे। गुरुदत्तं वरं विद्या+सरस्वती+मन्त्रं जपन् गुरुं भेजे। द्विजः भव+असक्तः जीवन्+मुक्तः अभवत्।११३-१४।

हे प्रभो, आपली कीर्ती थोरामोठ्यांनी गाइली आहे. मला एवढे सामर्थ्य कुठे आहे? ब्रह्मदेव चार मुखांनी आपले यश गाऊन थकला. हजार मुखांच्या शेषाच्याही जिभा तुला स्तवून फाटल्या. वेदही (नेति नेति म्हणत) स्तंभित झाले, तर आपल्या स्तवनाला माझी शक्ती कशी पुरी पडेल?११०.

अशी स्तुती करून त्या ब्राह्मणाने श्रीगुरूंना लोटांगणे घातली. प्रभू त्याला आश्वासन देत म्हणाले, 'माझ्या कृपाप्रसादाने तुला मोठेपण, संपत्ती, कीर्ती आणि सत्पुत्रांचा लाभ होईल. तुझा वंशही तुझ्यासारखाच होईल. आता तू आपल्या पत्नीला घेऊन ये आणि इथे गाणगापुरातच कायम राहा.'१११-१२. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो नरहरी ब्राह्मण पत्नीला घेऊन येऊन गाणगापुरातच राहिला. पुढे त्याला उत्तम पुत्र आणि कन्या झाले. श्रीगुरूंनी दिलेल्या श्रेष्ठ विद्यासरस्वती मंत्राचा जप करीत तो गुरूंची भक्ती करीत राहिला. त्या गुरुभजनाच्या प्रभावाने तो संसारातून विरक्त होऊन जीवन्मुक्त झाला.११३-१४.

**तत्कुलं चापि तत्तुल्यं तद्भक्तिमहिमा त्वियान् । त्वत्पूर्वजोऽपि तत्तुल्यस् तस्मात्ते मतिरीदृशी ।।१५।।**
**सद्गुरोस्तु प्रसादोऽयं भविष्यत्यपि ते कुले । वर्धमानः सदैवेति संविन्मे ब्राह्मण ध्रुवा ।।११६।।**

**।। इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिमहिमावर्णनं नाम प्रथमोऽध्यायः ।।**

**।। आदित एकोनविंशोऽध्यायः ।।**

**सप्ताहपारायणे पञ्चमः । अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिनारम्भे गुरुस्तुतिः ।**

तत् कुलं अपि तत् तुल्यम्। इयान् तत्+भक्ति+महिमा। त्वत्+पूर्वजः अपि तत्+तुल्यः। तस्मात् ते ईदृशी मतिः।१५। (हे) ब्राह्मण, अयं सद्गुरोः सदा एव वर्धमानः प्रसादः तु, ते कुले अपि भविष्यति इति मे ध्रुवा संवित्।११६।

मुंडकोपनिषदाच्या वचनाप्रमाणे (*न अस्याऽब्रह्मवित्कुले।* ३:२:९), त्याचे वंशजही त्याच्यासारखे गुरुभक्त झाले. असा श्रीगुरूंच्या भक्तीचा महिमा आहे. तुझे पणजोबाही त्या नरहरीसारखेच होते. म्हणून तर तुझी बुद्धी अशी गुरुभजनप्रवण आहे. अरे नामधारका, हा सद्गुरूंचा सतत वर्धिष्णु कृपाप्रसाद तुझ्याही वंशावरही राहणार आहे अशी ग्वाही माझे मन देत आहे.११५-१६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पहिला आणि प्रथमपासून एकूणविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ विंशोऽध्यायः ।।

**।। नामधारक उवाच ।।**

**को मत्पूर्वः कथं तेन सेवितो भगवान्प्रभुः । यत्प्रभावान्ममेदृग्धीस् तच्छ्रोतुं सादरोऽस्म्यहम् ।।१।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**प्रागुक्तं यवनात् त्रातः सायंदेव इति प्रिय । पूर्वः स एव तेऽश्रौषीद्गुरुं गन्धर्वपूःस्थितम् ।।२।।**
**तत्रैत्य प्रणतो विप्रो मठे दृष्ट्वा परात्परम् । नत्वा दण्डवदस्तौषीदुपसंगृह्य पद्द्वयम् ।।३।।**
**परमात्मन्परञ्ज्योतिः श्रीनृसिंहसरस्वति । भक्तेश श्रुतिचिन्त्यं ते सर्वतीर्थाश्रयं पदम् ।।४।।**

नामधारक उवाच। यत् प्रभावात् मम ईदृक् धीः कः मत्+पूर्वः? तेन कथं भगवान् प्रभुः सेवितः? तत् श्रोतुं अहं सादरः अस्मि।१। सिद्ध उवाच। (हे) प्रिय, प्राक् यवनात् सायंदेवः त्रातः इति उक्तम्। सः एव ते पूर्वः गुरुं गन्धर्वपुरं स्थितं अश्रौषीत्।२। प्रणतः विप्रः तत्र एत्य परात्परं दृष्ट्वा दण्डवत् नत्वा पद्+द्वयं उपसंगृह्य अस्तौषीत्।३। (हे) परमात्मन्, परंज्योतिः, श्रीनृसिंहसरस्वति, भक्तेश श्रुति+चिन्त्यं ते पदं सर्व+तीर्थ+आश्रयम्।४।

*विसाव्यांत परीक्षूनि सायंदेवावरि प्रसाद करिती। श्रीगुरु काशीयात्रा तसे अनंतव्रत निरूपिती।।१।।* नामधारकाने विचारले, 'आपण ज्या माझ्या पूर्वजामुळे माझी अशी सद्बुद्धी झाली म्हणता तो कोण? त्याने सद्गुरू भगवानांची कशा प्रकारे सेवा केली? हे ऐकण्यास मी सादर आहे.१. सिद्ध म्हणतात, 'मागे नवव्या अध्यायात ज्या सायंदेवाचे यवनापासून रक्षण केले असे सांगितले, त्याच तुझ्या पूर्वजाच्या कानांवर श्रीगुरू गाणगापुरी राहिले आहेत ही वार्ता पडली.२. तेव्हा तो विनीत ब्राह्मण गाणगापूरला आला आणि परमश्रेष्ठ सद्गुरूंना पाहून दंडवत घालून भावभराने त्यांचे पाय धरून स्तुती करू लागला.'३. 'परमात्मस्वरूपी सद्गुरो, आपण सूर्यादि तेजोमयांचेही प्रकाशक आहा. भक्तांचे स्वामी श्रीनृसिंहसरस्वती स्वामिमहाराज, आपले वेदांनी ध्याइलेले पाय सर्व तीर्थांना आश्रयभूत आहेत.४.

न मर्त्यस्त्वं महेशोऽसि त्र्य्यात्मा मानवाकृतिः । प्राणदानक्षमाम्ब्वाढ्य-कमण्डलुकरोऽसि कः ।।५।।
दुष्टनिग्रहसद्रक्षा-क्षमदण्डकरोऽस्यजः । शिवोऽसि मुक्तिदः पाप-तापनाशक्षमोग्रदृक् ।।६।।
मृतो जीवितो येन दुग्धा लुलायी वशा शुष्ककाष्ठं तरुत्वं प्रणीतम् ।
क्षणादन्त्यजोऽप्युद्धृतस्तेऽनुभावं क्षितौ कोऽर्हति ज्ञातुमन्यत्तवापि ।।७।।

।। श्रीगुरुरुवाच ।।

स्तुत्यानयास्मि ते विप्र भृशं तोषमुपागतः । भूयात्ते वंशमात्रस्य श्रद्धाभक्तिर्मयि ध्रुवा ।।८।।

त्वं मर्त्यः न। त्रयी+आत्मा मानव+आकृति महेशः असि। प्राण+दान+क्षम+अम्ब+आढ्य+कमण्डलु+करः कः असि।५। दुष्ट+निग्रह+सत्+रक्षा+क्षम+दण्ड+करः अजः असि। मुक्तिदः पाप+ताप+नाश+क्षम+उग्र+दृक् शिवः असि।६। 'येन मृतः जीवितः, वशा लुलायी दुग्धा, शुष्क+काष्ठं तरुत्वं प्रणीतं, अन्त्यजः अपि क्षणात् उद्धृतः, ते अनुभावं क्षितौ कः अपि ज्ञातुं अर्हति?'।७। श्रीगुरुः उवाच। '(हे) विप्र, अनया स्तुत्या भृशं तोषं उपागतः अस्मि। ते वंशमात्रस्य मयि ध्रुवा श्रद्धाभक्तिः भूयात्।८।

आपण मर्त्य मानव नाहीत तर मानवाचे रूप घेतलेले त्रयमूर्ती महेश आहात. प्राणदानाचे सामर्थ्य असलेल्या जलाने भरलेले कमंडलू हाती धरलेले ब्रह्मदेव (**कः**) आपण आहा.'५. दुष्टांचा निग्रह आणि सज्जनांचे रक्षण करण्याची क्षमता असलेला दंड धारण केलेले भगवान् विष्णू आपणच आहात. पाप आणि ताप यांचा नाश करण्याची शक्ती असलेल्या उग्र दृष्टीचे मुक्तिदायक भगवान शंकर आपण आहा.६. 'ज्यांनी मृताचेही संजीवन केले, वांझ महिषी दुभविली, वाळल्या काष्ठाचा बहरलेला वृक्ष केला, क्षणभरांत अंत्यजाचाही उद्धार केला, त्या आपले सामर्थ्य ह्या भूतलावर कोण जाणण्याजोगा आहे?'७. श्रीगुरू म्हणाले, 'ब्राह्मणा, ह्या तुझ्या स्तुतीने मी खूप प्रसन्न झालो आहे. तुझ्या वंशांतील सर्वांची माझ्यावर स्थिर श्रद्धा आणि भक्ती राहील.८.

**कच्चित्क्षेमं युवत्यादेस् तव ब्रूहि क्व तिष्ठसि । कालेन बहुना विप्र संगतोऽस्यद्य मत्प्रिय ।।९।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**देवदेव जगन्नाथ भगवन्त्वत्प्रसादतः । सर्वेषां क्षेममस्तीश काञ्च्यां तिष्ठाम्यहं स्वकैः ।।१०।।**
**योगक्षेमेक्षका भ्रातृ-पुत्रा मे तेऽनुकम्पया । त्वत्पादाब्जरसं पातुमलिप्रायोऽस्मि सम्प्रति ।।११।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कष्टं मे सेवनं नाज्ञ कोऽपि ज्ञातुं न शक्यते । ग्रामे नदीतटेऽरण्ये दुर्गमेऽपि वसाम्यहम् ।।१२।।**

तव युवत्यादेः कच्चित् क्षेमं (अस्ति)? क्व तिष्ठसि? ब्रूहि। (हे) विप्र, मत्+प्रिय, बहुना कालेन अद्य संगतः असि।'९। सायंदेव उवाच। '(हे) देवदेव, जगत्+नाथ, भगवन् त्वत्+प्रसादात् सर्वेषां क्षेमं अस्ति। (हे) ईश अहं स्वकैः काञ्च्यां तिष्ठामि।१०। मे भ्रातृ+पुत्राः ते अनुकम्पया योग+क्षेम+ईक्षकाः। सम्प्रति त्वत्+पाद+अब्ज+रसं पातुं अलिप्रायः अस्मि।'११। श्रीगुरुः उवाच (हे) न+अज्ञ , मे सेवनं कष्टं कः अपि ज्ञातुं न शक्यते। अहं ग्रामे, नदी+तटे, अरण्ये, दुर्गमे अपि वसामि।१२।

तुझी पत्नी आणि सर्व कुटुंबीयांचे क्षेमकुशल आहे ना? आणि तू कुठे राहतोस? मला सर्व सांग बरे! माझ्या प्रिय ब्राह्मणा, किती दिवसांनी तू आज भेटतो आहेस?'९. सायंदेव उत्तरला, 'देवाधिदेवा, जगन्नाथा, भगवंता, आपल्या प्रसादाने माझे बंधुवर्ग आणि पुत्र यांचा योगक्षेम चांगला चालला आहे. आत्ता मी आपल्या पदकमलांच्या मकरंदाचे पान करण्यासाठी भ्रमर होऊन आलो आहे.'११. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'माझी सेवा किती कठीण आहे तुला कळत नाही असे नाही. अरे कुणालाही - देवादिकांनाही, ते कळणे शक्य नाही. मी कधी गावात राहतो, तर कधी नदीकिनारी, कधी अरण्यात तर कधी आणखी दुर्गम ठिकाणी!'१२.

**तच्छ्रुत्वा सोऽनुयास्यामि यत्र क्वापीत्थमाददे । तथेत्युक्त्वैकदा शम्भुस् तेनागात्सह संगमम् ॥१३॥**
**निवार्यान्यान्समं तेन स्थित्वाश्वत्थतले निशि । वृष्ट्यै तदादिदेशाब्दमकालेऽपि परीक्षितुम् ॥१४॥**
**गर्जिताब्दो ववर्षारं झञ्झावातसखस्तदा । क्षणप्रभापि मुष्णन्ती दृष्टिमासीदनुक्षणम् ॥१५॥**
**उपर्युपरि वस्त्रैस्तं समन्तात्स प्रकम्पितम् । सहिष्णुः श्रीगुरुं भेज आसारार्तिरणद् द्विजः ॥१६॥**
**यामाभ्यां खण्डितं वर्षं दृष्ट्वोचे तं गुरुः पुरम । गत्वाग्निमानयात्यन्तं क्लिन्नाङ्गे शीतमुत्थितम् ॥१७॥**

तत् श्रुत्वा सः 'यत्र क्व अपि अनुयास्यामि' इत्थं आददे। 'तथा' इति उक्त्वा शम्भुः तेन सह संगमं अगात्।१३। निशि अन्यान् निवार्य तेन समं अश्वत्थ+तले स्थित्वा तदा (तं) परीक्षितुं अकाले अपि अब्दं वृष्ट्यै आदिदेश।१४। तदा झंझावात+सखः गर्जित+अब्दः अरं ववर्ष। क्षणप्रभा अपि अनुक्षणं दृष्टिं मुष्णन्ती आसीत्।१५। सः आसार+आर्ति+रणत्+द्विजः सहिष्णुः उपरि+उपरि वस्त्रैः प्रकम्पितं गुरुं भेजे।१६। वर्षं यामाभ्यां खण्डितं दृष्ट्वा गुरुः तं ऊचे। क्लिन्न+अङ्गे अत्यंतं शीतं उत्थितम्। पुरं गत्वा अग्निं आनय।१७।

त्यावर 'आपण जिथे कुठे जाल तिथे मी आपल्या मागे येईन,' असे त्याने अंगीकारले. 'ठीक आहे,' असे म्हणून श्रीगुरू एकदा त्याच्याबरोबर संगमावर गेले.१३. रात्री इतर सर्वांना पाठवून फक्त सायंदेवालाच ठेवून त्यांनी मेघाला अकालीच वर्षा करण्याचा आदेश दिला.१४. तेव्हा झंझावातासह गरजणारे मेघ धो धो कोसळू लागले. क्षणोक्षणी डोळे दिपवणारी वीजही (**क्षणप्रभा**) चमकू लागली.१५. भिजून चिंब झालेल्या सायंदेवाचे दात वाजू लागले. ते सर्व सहन करीत त्या ब्राह्मणाने थरथरणाऱ्या श्रीगुरूंच्यावर वस्त्रे धरून त्यांची सेवा केली.१६. दोन प्रहरांनी पाऊस ओसरल्याचे पाहून श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अंग चिंब भिजले आहे आणि थंडी फार वाजते आहे. गावात जाऊन विस्तव आण. मात्र जाताना इकडे तिकडे कुठे पाहू नकोस आणि माझे चिंतन करीत जा.'१७.

**कुत्रापीततस्ततोऽपश्यन् याहि मामनुचिन्तयन् । तच्छ्रुत्वागात्स करक-चूर्णिताङ्गोपि शीकरैः ॥१८॥**
**क्लेदितात्माप्यनुध्यायन् चञ्चलातेजसोऽयनम् । प्रविश्य गोपुराद् द्वाःस्थ-दत्तमार्गः पुरं स तु ॥१९॥**
**गृहीतभाजनन्यस्त-वह्निः शीघ्रं न्यवर्तत । ज्ञातुं गुरूक्तिहेतुं स व्यधाद् दृष्टिमितस्ततः ॥२०॥**
**पार्श्वद्वयतलस्थोग्र-सर्पौ दृष्ट्वाऽगमज्जवात् । दृष्ट्वानुयातावपि तौ भीतो दध्यौ हरेः पदम् ॥२१॥**
**तदोच्चैः सङ्गमे वेद-ध्वनिं श्रुत्वा विलोक्य च । द्योतं भ्रान्तो द्रुतं प्राप्य दृष्ट्वैकं स्वगतं द्विजः ॥२२॥**
**कैः कृतोऽयं ध्वनिर्द्योतः क्वेत्यभूच्छङ्कितः स तम् । भीतं प्राह गुरुर्मा भीस्त्वद्गुप्त्यै तौ प्रचोदितौ ॥२३॥**

इतः ततः कुत्र अपि अपश्यन् मां अनुचिन्तयन् याहि। तत् श्रुत्वा करक+चूर्णित+अङ्गः अपि शीकरैः क्लेदित+आत्मा अपि सः चञ्चला+तेजसः अयनं अनुध्यायन् अगात्। गोपुरात् द्वाः+स्थ+दत्त+मार्गः पुरं प्रविश्य तु सः गृहीत+भाजन+न्यस्त+वह्निः शीघ्रं न्यवर्ततत। सः गुरु+उक्ति+हेतुं ज्ञातुं दृष्टिं इतस्ततः व्यधात्।१८-२०। पार्श्व+द्वय+तलस्थ+उग्र+सर्पौ दृष्ट्वा जवात् अगमत्। तौ अपि अनुयातौ दृष्ट्वा भीतः हरेः पदं दध्यौ।२१। तदा सङ्गमे उच्चैः वेदध्वनिं श्रुत्वा द्योतं च विलोक्य भ्रान्तः द्रुतं प्राप्य एकं (गुरुं) दृष्ट्वा द्विजः स्वगतं, 'कैः अयं ध्वनिः कृतः? क्व द्योत?' इति शङ्कितः अभूत्। सः गुरुः तं भीतं प्राह, 'मा भीः। तौ त्वत्+गुप्त्यै प्रचोदितौ'।२२-२३।

ते ऐकून गारांचा मार खात आणि पावसाच्या रिमझिमीत भिजत तो त्या अंधाऱ्या रात्री विजेच्या प्रकाशाने रस्ता निरखीत निघाला.१८. गोपुरात द्वारपालांनी वाट दिल्यावर तो गाणगापुरात प्रवेशला आणि एका भांड्यात विस्तव घेऊन घाईने परतला. येतांना गुरूंनी इकडे तिकडे न पाहायला का सांगितले म्हणून त्याने दोन्ही बाजूंना दृष्टी टाकली.१९-२०. आपल्या दोन्ही बाजूंना दोन भयंकर साप येताना पाहून तो घाबरून पळू लागला. तरीही ते साप आपल्या मागेच येत असलेले पाहून भीतीने तो श्रीगुरूंच्या पायांचे ध्यान करू लागला. तेव्हा त्याला संगमाकडून मोठा वेदध्वनी ऐकायला आला आणि खूप प्रकाशही दिसला. त्वरेने येऊन पाहता त्याला फक्त एकटे श्रीगुरूच दिसले.२१. तो 'हा आवाज कुणी केला आणि प्रकाश कुठला?' अशा विचाराने गोंधळून गेला. त्याला तसा घाबरलेला पाहून श्रीगुरू म्हणाले, 'अरे ते साप तुझ्या रक्षणासाठी पाठविले होते.'२२-२३.

**तदाप्यही गुरुं नत्वा जग्मतुस्तं प्रभुर्द्विजम् । प्राहेदृशी गुरोः सेवा मरुतामपि दुष्करा ।।२४।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भगवन्ननुकम्पाब्धे शरणागतवत्सल । सेवातत्त्वमुपाख्याहि श्रीगुरोस्तारकं परम् ।।२५।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**छायौपम्येन संसेव्यो गुरुस्तत्त्वमिदं परम् । प्रार्पयेन्नियतं देहं सार्थं तस्मै परात्मदृक् ।।२६।।**
**सर्वभावेन बुद्ध्वेशं तं भजेत्तत्प्रसादभुक् । तद्ध्यानजीवनस्तत्पत् तीर्थपस्तत्कथारतिः ।।२७।।**

तदा अही अपि गुरुं नत्वा जग्मतुः। प्रभुः तं द्विजं प्राह, 'ईदृशी गुरुसेवा मरुतां अपि दुष्करा।'२४। सायंदेव उवाच। '(हे) भगवन्, अनुकम्पा+अब्धे शरण+आगत+वत्सल, परं तारकं श्रीगुरोः सेवा+तत्त्वं उपाख्याहि।'२५। श्रीगुरुः उवाच। 'गुरुः छाया+औपम्येन संसेव्यः इदं परं तत्त्वम्। पर+आत्म+दृक् तस्मै स+अर्थं देहं प्रार्पयेत्।२६। तं सर्व+भावेन ईशं बुद्ध्वा तत्+प्रसाद+भुक् तत्+ध्यान+जीवनः तत्+पत्+तीर्थ+पः तत्+कथा+रतिः तं भजेत्।'२७।

तेवढ्यात ते सापही श्रीगुरूंना वंदन करून निघून गेले. प्रभू त्या ब्राह्मणाला म्हणाले, 'अशी ही गुरुसेवा देवादिकांनाही दुष्कर आहे. तू तर माणूस आहेस.'२४. तेव्हा सायंदेवाने प्रार्थना केली, 'अहो दयासागर शरणागतवत्सल भगवंता, श्रेष्ठ तरणोपाय असलेले श्रीगुरूंच्या सेवेचे तत्त्व आपण मला समजावून सांगावे.'२५. श्रीगुरूंनी सांगायला आरंभ केला. 'माणसाची सावली जशी उठता, बसता, चालता त्याच्या बरोबर राहते त्याचप्रमाणे निरंतर गुरूंच्या सेवेत राहावे, हेच परम तत्त्व आहे. परमार्थावर दृष्टी ठेवून धनासह तनू त्याना वाहून टाकावी.'२६. सर्व भावांनी त्याला परमेश्वर मानून त्याचा प्रसाद घ्यावा, त्याच्या ध्यानात जीवन वेचावे, त्याच्या पायाचे तीर्थ घ्यावे, त्याच्या कथांतच रमावे आणि त्यालाच भजावे.२७.

**दुःसाध्येऽपि यदादिष्टं कार्ये भक्त्या तदारभेत् । आरब्धं स नयेत्सिद्धिं भीतः कालोऽप्यपैत्यतः ॥२८॥**
**शृणु गौरीशसंवादं ब्राह्मस्त्वष्टाभजद् गुरुम् । विद्यार्थी सर्वभावात्तद् दार्ढ्यं ज्ञातुं गुरुर्जगौ ॥२९॥**
**वर्षास्वापः पतन्त्यत्र प्रत्यब्जमुटजे त्वतः । रचयैकं गृहं रम्यं सुखदं नूत्नवत्सदा ॥३०॥**
**शिष्यं तदाश्रुत्य यान्तं गुरुस्त्रीः प्राह कञ्चुकम् । देहि मेऽङ्गमितं चित्रं मनोहरमकृत्रिमम् ॥३१॥**
**पुत्रोऽप्याहाङ्घ्रियोग्ये मे पादुके देहि येऽम्भसि । गर्तेऽपि यातुः सुखदे चिन्तितस्थलनायके ॥३२॥**

दुःसाध्ये अपि कार्ये यत् आदिष्टं तत् भक्त्या आरभेत्। सः आरब्धं सिद्धिं नयेत्। अस्मात् भीतः कालः अपि अपैति। अतः(?)।२८। गौरी+ईश+संवादं शृणु। ब्राह्मः त्वष्टा विद्यार्थी गुरुं सर्व+भावात् अभजत्। गुरुः तत् दार्ढ्यं ज्ञातुं जगौ।२९। 'प्रति+अब्जं वर्षासु उटजे आपः पतन्ति। अतः एकं रम्यं सुखदं सदा नूत्नवत् गृहं रचय।'३०। तदा गुरुस्त्रीः शिष्यं यातं आश्रुत्य प्राह, 'मे अङ्ग+मितं चित्रं मनोहरं अकृत्रिमं कञ्चुकं देहि।'३१। पुत्रः अपि आह, 'मे अङ्घ्रियोग्ये सुखदे चिन्तित+स्थल+नायके पादुके देहि, ये गर्ते अपि यातुः।'३२।

श्रीगुरूंनी जरी एखादे दुष्कर असे कार्य करण्याची आज्ञा केली तरी भक्तीने त्या कामाला लागावे. शिष्याने आरंभिलेले कार्य गुरू सिद्धीला नेतातच. प्रत्यक्ष काळही ह्या गुरुभक्ताला वचकून असतो, त्यामुळे मरणाचीही भीती बाळगू नये.२८. याविषयी एक शिव आणि पार्वती यांच्यांतील संवाद ऐक. ब्रह्मदेवाचा पुत्र त्वष्टा विद्या शिकण्यासाठी म्हणून सर्वभावे गुरूला भजत होता. त्याची भक्ती किती दृढ आहे ह्याची परीक्षा घेण्यासाठी गुरुजी त्याला म्हणाले, 'अरे शिष्या, दर वर्षी पावसाळ्यात आपल्या घरात पाणी गळते. तू एक सुंदर सुखदायक नेहमी नवीन राहील असे नेटके घर बांधून दे.'३०. तेव्हा तो शिष्य कामाला जातो आहे असे ऐकून गुरुपत्नी म्हणाली, 'बाळा, मला एक छानशी, न शिवलेली, कायम माझ्या अंगाला येणारी चोळी करून दे.'३१. गुरुपुत्रानेही आपली मागणी केली. 'मला माझ्या मापाच्या सुखद पादुका करून दे, ज्या खड्ड्यांतूनही जातील आणि मला हव्या त्या ठिकाणी घेऊन जातील.'३२.

**कन्याह कुण्डले दन्ति-दन्तभूतं प्रदेहि मे । लसत्क्रीडागृहं चैक-स्तम्भं पुत्तलिका अपि ।।३३।।**
**सचेतनाः सदा येषु पाकः शैत्यं न यास्यति । अनञ्जनस्पृग्भाण्डानीत्याकर्ण्य स ययौ वनम् ।।३४।।**
**अज्ञोऽस्म्यप्यत्र गुर्वर्थं मर्तव्यमिति तं वने । निर्विण्णमाययौ कश्चिदवधूतो दयार्द्रधीः ।।३५।।**
**व्यपेतभीः प्रहृष्टात्मा गुरुभावनया स तम् । उपसंगृह्य तत्तस्मै शशंस गुरुभाषितम् ।।३६।।**
**तमाश्वास्याब्रवीत्साधुः काशीक्षेत्रे त्वभीष्टदे । सति जाग्रति विश्वेशे किं केषां दुर्लभं वद ।।३७।।**

कन्या आह। मे कुण्डले, दन्ति+दन्त+भूतं लसत् एक+स्तम्भं क्रीडा+गृहं, सचेतनाः पुत्तलिकाः, अन्+अञ्जन+स्पृक् भाण्डान् येषु पाकः शैत्यं न याति, प्रदेहि। इति आकर्ण्य सः वनं ययौ।३३-३४। 'अज्ञः अस्मि। गुरु+अर्थं अत्र मर्तव्यं' इति निर्विण्णं तं कश्चित् दया+आर्द्र+धीः अवधूतः आययौ।३५। व्यपेत+भीः प्रहृष्ट+आत्मा सः तं गुरु+भावनया उपसंगृह्य तस्मै गुरु+भाषितं शशंस।३६। साधुः तं आश्वास्य अब्रवीत्। अभीष्ट+दे काशीक्षेत्रे तु विश्व+ईशे जाग्रति केषां किं दुर्लभम्, वद।३७।

तेवढ्यात गुरुकन्याही त्याला म्हणाली, 'कुंडले, हस्तीदंताचे बनवलेले एकखांबी खेळातले घर, जिवंत पुतळ्या, ज्यांना काजळी लागणार नाही आणि ज्यात स्वयंपाक थंड होणार नाही अशी भांडी, असे सर्व मला दे.' ह्या सर्वांच्या मागण्या ऐकून तो त्या पुरविण्यासाठी वनात गेला.३३-३४. 'मी तर एक अजाण बालक आहे. हे सगळे मी कुठून आणणार? इथे गुरूंच्या कामात जीव द्यावा' अशा विचाराने निराश झाला असता तिथे कुणी दयार्द्र अंतःकरणाचा एक अवधूत आला.३५. त्याला पाहून त्या त्वष्ट्याची भीती गेली आणि त्याचे मन प्रसन्न झाले. त्या अवधूताला 'हे आपले गुरूच आहेत' असे मानून त्याने त्यांचे पाय धरले आणि त्याला आपल्या गुरूंच्या आणि इतरांच्या मागण्या सांगतल्या.३६. त्या साधूंनी त्याला धीर दिला आणि म्हणाले, 'आपल्या अभीष्टाची पूर्ती करणाऱ्या काशीक्षेत्रात विश्वेश्वर सदैव जागत असता कुणाला काय दुर्लभ आहे? सांग.'३७.

**तत्रत्यपुण्यं को वेत्ति तद्वास्युद्वीक्षणादपि । अपैत्यघौघः किं वाच्यं सुखमानन्दकानने ।।३८।।**
**पुमर्थदोऽपि विश्वेशः प्राणिमात्रं मृतं क्षणात् । स तारकोपदेशेन दत्ते मुक्तिमनुक्षणम् ।।३९।।**

**।। शिष्य उवाच ।।**

**क्वास्ते काशी क्व विश्वेशो जाने स्वर्भुवि वा न तत् । प्रार्थये तारकं त्वां मे दर्शयाज्ञोऽस्मि केवलम् ।।४०।।**
**स प्राह त्वां नयाम्यद्य त्वद्योगात् क्षेत्रदर्शनम् । स्यान्मेऽप्ययत्नतो जन्म-साफल्यं यद्यदीक्षणात् ।।४१।।**
**तमादाय ततो योग-गत्या शीघ्रं महामुनिः । काशीं गत्वा क्षेत्रयात्रां यथाक्रममुपादिशत् ।।४२।।**

'तत्रत्यपुण्यं कः वेत्ति? तत्+वासी+उद्वीक्षणात् अपि अघ+ओघः अपैति। आनन्द+कानने सुखं किं वाच्यम्?'३८। 'विश्वेशः पुं+अर्थदः अपि मृतं प्राणि+मात्रं सः तारक+उपदेशेन क्षणात् अनुक्षणं मुक्तिं दत्ते।'३९। शिष्य उवाच। काशी क्व आस्ते? क्व विश्वेशः? तत् स्वः भुवि वा न जाने। त्वां (अहं) प्रार्थये, मे दर्शय, केवलं अज्ञः अस्मि।४०। ततः महा+मुनिः तं आदाय योग+गत्या शीघ्रं काशीं गत्वा यथाक्रमं काशी+यात्रां उपादिशत्।४२।

त्या काशी क्षेत्रात राहणाऱ्यांचे पुण्य कोण जाणू शकेल? काशीवासियांच्या दर्शनानेसुद्धा पापांच्या राशी नष्ट होतात. ज्याचे नावच आनंदकानन आहे त्या काशी क्षेत्रातील सुखाचे काय वर्णन करावे?३८. तिथे विश्वेश्वर पुरुषार्थ तर पुरवतातच, पण तिथे मृत्यू पावणाऱ्या प्रत्येक प्राणीमात्राला सतत तारक मंत्राचा (रामनाम किंवा ॐकार) उपदेश करून मुक्ती देत असतात. तारसार उपनिषदात आणि पुराणातही '*तारकं ब्रह्म व्याचष्टे*' असे वचन आहे.३९. शिष्याने विचारले, 'ही काशी आणि विश्वेश्वर कुठे आहेत. भूमीवरच आहेत की स्वर्गांत मला ठाऊक नाही. महाराज, मी आपल्याला प्रार्थना करतो की आपणच मला दाखवावे. मी अगदी अजाण आहे!'४०. तेव्हां ते महामुनी त्याला घेऊन योगगतीने काशीला गेले आणि त्याला क्रमशः संपूर्ण काशीयात्रेचे निरूपण केले.४२.

**विश्वेशदर्शनं चान्तर् गृहयात्रां यथाक्रमम् । दक्षिणोदङ्मानसाख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात् ।।४३।।**
**स्नानदानार्चनश्राद्ध-युक्तां यात्रां च पाक्षिकीम् । भवानीशो हरिर्धुण्डिर् दण्डपाणिश्च भैरवः ।।४४।।**
**गुहः काशी च गङ्गाद्या देवा लिङ्गानि सर्वशः । इत्यादीनां पूजनं च निवेद्य स्थापनं तथा ।।४५।।**
**स्वनामाङ्कितलिङ्गस्य कथयित्वा यथोक्तवत् । कुरु प्रसीदेद्विश्वेश इत्युक्त्वान्तर्दधे स्वयम् ।।४६।।**
**मद्भावस्य परीक्षायै गुरु रूपान्तरादयम् । प्राप्तः किलेति मत्वा स यथानिर्दिष्टमाचरत् ।।४७।।**

यथा+क्रमं विश्वेश+दर्शनं, अन्तः+गृह+यात्रां च, दक्षिण+उदक्+मानस+आख्यां पञ्चक्रोशीं च विस्तरात्..।४३। स्नान+दान+अर्चन+ श्राद्ध+युक्तां पाक्षिकीं यात्रां च, भवानी, ईशो, हरिः धुण्डिः दण्डपाणिः च भैरवः,।४४। गुहः काशी च गङ्गा आद्याः देवाः सर्वशः लिङ्गानि इत्यादीनां पूजनं निवेद्य तथा..।४५। स्व+नाम+अङ्कित+लिङ्गस्य स्थापनं कथयित्वा 'यथा+उक्त+वत् कुरु, विश्वेश प्रसीदेत्' इति उक्त्वा स्वयं अन्तर्दधे।४६। सः 'अयं मत्+भावस्य परीक्षायै गुरुः रूपान्तरात् प्राप्तः किल,' इति मत्वा सः यथा+निर्दिष्टं आचरत्।४७।

क्रमशः विश्वेश्वराचे दर्शन, अंतर्गृहयात्रा, दक्षिणमानसयात्रा, उत्तरमानसयात्रा, पञ्चक्रोशीची यात्रा,(४३) स्नान, दान, पूजा, श्राद्ध यांसह शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या यात्रा, भवानी, विश्वेश्वर, विष्णू, धुण्डिराज, दण्डपाणि तसेच भैरव,(४४) गुह, काशी, गंगा इत्यादि देवांच्या आणि सर्व लिंगांची पूजा सांगून स्वतःच्या नावाचे लिंग स्थापन करण्यास सांगून, 'मी जसे सांगितले तसे सर्व कर,' असे बोलून ते महामुनी अंतर्धान पावले.४६. 'हे माझे गुरूच माझ्या भक्तीची परीक्षा घ्यायला रूप पालटून आले' असा मनाशी निश्चय करून त्या त्वष्ट्याने त्याप्रमाणे सर्व यात्रा यथासांग केल्या.४७.

**चरित्वा क्षेत्रयात्रां स लिङ्गं संस्थापयत्तदा । विश्वेशो दर्शयित्वा स्वं रूपं प्रीतोऽब्रवीदिदम् ।।४८।।**
**वत्स वत्स पवित्रोऽसि गुरुभक्त्या विशुद्धया । धन्योऽस्यनुगृहीतोऽसि वृणीष्वाभीप्सितं वरम् ।।४९।।**
**शिष्योऽपि गुरुतत्पत्नी-पुत्रोक्तीस्तं तथाब्रवीत् । कलाविद्यापटुर्भूत्वा ज्ञानविज्ञानवानिह ।।५०।।**
**प्रसार्य क्वापि चातुर्यं लोकख्यातो भविष्यसि । इत्युक्त्वान्तर्दधे विश्वेट् ततः सोऽप्यााययौ गुरुम् ।।५१।।**
**याचिताखिलवस्तूनि श्रीविश्वेशप्रसादतः । निर्मायादात्कृती तेन गुरुस्तुष्टस्तमब्रवीत् ।।५२।।**

सः क्षेत्रयात्रां चरित्वा लिङ्गं संस्थापयत्। तदा विश्वेशः प्रीतः तं स्वं रूपं दर्शयित्वा इदं अब्रवीत्।४८। 'हे' वत्स, वत्स, विशुद्धया गुरुभक्त्या पवित्रः असि, धन्यः असि, अनुगृहीतः असि, अभीप्सितं वरं वृणीष्व।४९। शिष्यः अपि गुरु+तत्+पत्नी+पुत्र+उक्तीः तथा अब्रवीत्। 'इह कला+विद्या+पटुः, ज्ञान+विज्ञान+वान् भूत्वा,।५०। क्व अपि चातुर्यं प्रसार्य, लोकख्यातः भविष्यसि' इति उक्त्वा विश्वेट् अन्तर्दधे। ततः सः अपि गुरुं आययौ।५१। कृती श्रीविश्वेश+प्रसादतः याचित+अखिल+वस्तूनि निर्माय अदात्। तेन तुष्टः गुरुः तं अब्रवीत्।५२।

संपूर्ण क्षेत्रयात्रा करून झाल्यावर त्याने आपल्या नावाने शिवलिंगाची स्थापना केली. तेव्हा प्रत्यक्ष विश्वेश्वर प्रसन्न होऊन त्याच्यापुढे प्रकटले आणि म्हणाले,(४८) 'बाळा रे बाळा! अत्यंत शुद्ध गुरुभक्तीने तू पवित्र झाला आहेस, तू धन्य आहेस. तुझ्यावर माझा अनुग्रह आहे. तुला हवा असलेला वर तू मागून घे.'४९. शिष्यानेही त्यांना आपले गुरू, त्यांची पत्नी, पुत्र आणि कन्या यांच्या मागण्या निवेदन केल्या. तेव्हा भगवान विश्वनाथ म्हणाले, 'तू चौसष्ट कला, चौदा विद्या यात प्रवीण होशील. लौकिक आणि पारमार्थिक ज्ञानाने संपन्न होशील. भूलोकातच काय पण कुठेही स्वर्गात वा पाताळातही तू तुझ्या चातुर्याचा प्रभाव पसरवशील. तू सर्व लोकांत प्रसिद्ध होशील.' एवढे बोलून भगवान अदृश्य झाले. तो शिष्य गुरूंच्या घरी परतला.५०. अशा कृतकृत्य झालेल्या शिष्याने काशीविश्वेश्वराच्या प्रसादाने त्यांच्या सर्व मागण्यांप्रमाणे वस्तू निर्माण करून त्यांना अर्पण केल्या. त्यामुळे प्रसन्न झालेले गुरू त्याला म्हणाले.५२.

**भूत्वा ज्योतींषि यावत्त्वं चिरजीवी प्रसार्य सत् । चातुर्यं सर्वलोकेषु त्वं स्रष्टेवापरो भव ।।५३।।**
**तव सर्वर्धिनिधयो वशाश्चिंताव्यथादिकाः । न स्पृशन्ति कदापि त्वां प्रसादोऽयं मम ध्रुवः ।।५४।।**
**ततः प्रस्थापयामास तं स्वस्थानमुपेत्य सः । भूत्वा गुरूक्तवद्ध्यास्ते श्रीमंस्त्वष्टाखिलश्रुतः ।।५५।।**
**इति गौर्यै शिवेनोक्तं सेवातत्त्वं त्विदं गुरोः । तदुक्ताचरणं भक्त्या सर्वभावात्तदर्चनम् ।।५६।।**
**एतावदुक्त्वा विरते गुरौ द्विजो नत्वाब्रवीदद्य विचित्रमीक्षितम् ।**
**काशीपुरं वै भवता सहाखिलं यद्यत्समाख्यातमवेक्षितं समम् ।।५७।।**

'यावत् ज्योतींषि चिरजीवी त्वं सर्व+लोकेषु चातुर्यं प्रसार्य सत् त्वं अपरः स्रष्टा एव भव।५३। तव सर्व+ऋद्धि+निधयः वशाः। चिंता+व्यथा+आदिकाः त्वां कदा अपि न स्पृशन्ति। अयं मम ध्रुवः प्रसादः।५४। ततः तं प्रस्थापयामास। सः स्व+स्थानं उपेत्य गुरु+उक्तवत् भूत्वा श्रीमन् त्वष्टा अखिलश्रुतः आस्ते।'५५। इति गौर्ये शिवेन उक्तं इदं गुरोः सेवा+तत्त्वं तु तत्+उक्त+आचरणं, भक्त्या सर्व+भावात् तत् अर्चनम्।५६। एतावत् उक्त्वा गुरौ विरते द्विजः नत्वा अब्रवीत्। 'अद्य विचित्रं ईक्षितम्। भवता सह अखिलं काशीपुरं, यत् यत् समाख्यातं समं अवेक्षितम्।५७।

'तू आचंद्रसूर्य चिरंजीव होशील. त्रैलोक्यात आपल्या कौशल्याची छाप टाकून तू प्रतिब्रह्मदेवच होशील.५३. सर्व ऋद्धी, सिद्धी आणि निधी तुला वश होतील. चिंता, व्यथा आदि तुला शिवणारही नाहीत. हा माझा तुला शाश्वत प्रसाद आहे.'५४. असे बोलून गुरूंनी त्याला निरोप दिला. आपल्या स्थानी येऊन तो गुरूंच्या आशीर्वादाप्रमाणे सर्व सिद्धी पावला. त्वष्टा आजही श्रीमान् आणि सर्व लोकांत प्रख्यात आहे.५५. पार्वतीमातेला शंकरांनी सांगितलेले गुरुसेवेचे तत्त्व हेच आहे की, त्यांच्या वचनाचे पालन करून भक्तीभावाने सर्व प्रकारे त्यांचे पूजन करावे.५६. एवढे सांगून श्रीगुरू शांत राहिले. तेव्हा सायंदेव वंदन करून त्यांना म्हणाला, 'आज मी चमत्कार पाहिला! आपल्यासह मी सगळी काशी पाहिली. आपण जे जे सांगत होता ते ते सर्व मी प्रत्यक्ष पाहिले. खरोखर, कुठे काशी, कुठे मी आणि तसेच कुठे आपण? सर्व कांही पूर्वी न पाहिलेले आपण मला दाखविले!५७.

**क्वाहं क्व काशी क्व भवांस्तथापि वा अदृष्टपूर्वं सकलं प्रदर्शितम् ।**
**न त्वं नरो नासि सुरो न चेतरो नूनं परात्मैव परावरोऽस्यजः ।।५८।।**
**प्राग्ब्रह्म त्वमजोऽक्रियोऽपि बहुलं स्यामित्यभूद्धीस्तया । सृष्ट्वैवाण्डभुवं ततो जगदिदं सृष्टं सधर्मं गुणैः ।।**
**स्वैः स्वं भो रमयन्विहंसि सदरीनत्रावतीर्यानिशं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।५९।।**

क्व अहं? क्व काशी? क्व भवान् तथा अपि वा? सकलं अदृष्टपूर्वं प्रदर्शितम्! त्वं न नरः, न सुरः न च इतरः असि। नूनं पर+अवरः अजः परात्मा एव असि।'५८। प्राक् त्वं ब्रह्म अजः अक्रियः अपि बहुलं स्याम् इति धीः अभूत्। तया अण्ड+भुवं सृष्ट्वा ततः स्वैः गुणैः इदं जगत् सधर्मं सृष्टम्। स्वं रमयन् अत्र अवतीर्य अनिशं सत्+अरीन् विहंसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्री+पद+अब्ज+द्वयं वन्दे।५९।

आपण ना मनुष्य आहात, ना देव, ना आणखी कुणी! आपण ब्रह्मादिकांहून श्रेष्ठ आहात. जन्मादिविकाररहित साक्षात् परमात्माच आपण आहांत!'५८. असे बोलून त्या सायंदेवाने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. हे शार्दूलविक्रीडित वृत्तांतील अष्टक आहे. जगाची उत्पत्ती होण्यापूर्वी नित्य, शुद्ध, बुद्ध ह्या लक्षणांनी जाणले जाणारे ब्रह्म अविकारी आणि निष्क्रिय होते. त्याचा 'मी एक आहे तो बहुल (अनेक) व्हावा,' असा संकल्प झाला. आत्मा एकमेवाद्वितीय आहे. त्याला बहुलत्व कसे येणार? आत्म्यावेगळी अशी कोणतीच वस्तू असूच शकत नाही. आत्म्याचे अनेकत्व हे आकाशाच्या अनेकत्वा प्रमाणे जाणावे. आकाश एकच आहे. पण घट, मठ आदींना व्यापून ते घटाकाश, मठाकाश, महदाकाश अशा नावांनी ओळखले जाते. म्हणजे त्याचे अनेकत्व वस्तुसापेक्ष आहे. तसेच आत्म्याचे अनेकत्वही वस्तुसापेक्षच आहे. सृष्टीतील सर्व पदार्थ सर्व अवस्थात ब्रह्मात्मकच असतात. ब्रह्मावाचून कोणत्याही वस्तूला अस्तित्व असूच शकत नाही. ब्रह्म मात्र त्या वस्तूच्या पलीकडे असते.

अनेक होण्याचा संकल्प म्हणजेच मूळमाया किंवा प्रकृती. तिच्याद्वाराच ब्रह्मदेव झाले आणि त्यांच्यापासून हे आपल्या गुणधर्मासहित जगत् उद्भवले. हे सद्गुरो, आपल्या स्वरूपापासूनच आपण कल्पिलेल्या ह्या मायामय त्रिगुणात्मक पाचभौतिक सृष्टीत अवतरून (मायेचा स्वेच्छेने अंगीकार करून) आपण सतत दुष्टांचे निर्दालन करता.

**कल्याकृष्टहृदुज्झितक्रतुनर-त्रस्ताध्वराशीर्मुदे । प्रातः सूर्य इवोदितोऽस्यज महामोहान्धकारं ग्रसन् ।।**
**सद्धर्माश्रमसेतुमत्र शिथिलप्रायं सुदार्ढ्यं नयन् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६०।।**
**सर्वानन्दनिधानरूपममलं स त्वं सुखं मूर्तिमत् । प्रादुष्कृत्य जनत्रयान्तरमृग-क्रीडावनं पावनम् ।।**
**संसारावटमग्नमुद्धरसि भो स्वीकृत्य तुर्याश्रमम् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६१।।**

कलि+आकृष्ट+हृत्+उज्झित+क्रतु+नर+त्रस्त अध्वर+आशीः मुदे, (हे) अज, मोह+अन्धकारं ग्रसन् प्रातः सूर्य इव उदितः असि। अत्र शिथिल+प्रायं सत्+धर्म+आश्रम+सेतुं सुदार्ढ्यं नयन् (वर्तसे)। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६०। (भो) सर्व+आनन्द+निधान, स त्वं मूर्तिमत् सुखं जन+त्रय+अन्तर+मृग+क्रीडा+वनं पावनं प्रादुष्कृत्य तुर्याश्रमं स्वीकृत्य संसार+अवट+मग्नं उद्धरसि। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वरं श्रीपद अब्ज द्वयं वन्दे।६१।

हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. या अष्टकाची टीका लिहिताना प्रत्येक श्लोकाच्या टीकेनंतर त्याचा भावार्थ दर्शविणारा एक सुगम अनुष्टुभ् श्लोक दिला आहे. *बहु स्यामिति संकल्प्य स आद्योऽभूज्जगत्स्वयं। श्रीदत्तः शिक्षयन्दुष्टान्रमते स्वात्मना स्वयं।।१।।*५९.

अधर्माचा मित्र असलेल्या कलीकडे चित्त आकर्षिल्यामुळे मनुष्यांनी यज्ञ (विहित कर्म आणि उपासना) टाकल्याने त्रस्त झालेल्या देवतांच्या संतोषासाठी, तसेच मूल अज्ञानरूपी महामोहाचा अंधार (तम) नष्ट करण्यासाठी, आपण प्रातःकाळच्या सूर्यासारखे प्रकट झाला आहात. वर्णाश्रमधर्माची विस्कटलेली घडी बसविण्यासाठी अवतरलेल्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *नरैस्त्यक्तेषु यागेषु कलिदोषहतैरिह। देवानन्दप्रदो दत्तोऽवतीर्णो धर्मभावनः।।२।।*६०. सर्व परमानन्दाचे आगर, सुखाची गाळीव मूर्ती, मुक्त, मुमुक्षू आणि बद्ध अशा त्रिविध जनांच्या मानसरूपी मृगांचे क्रीडावन असलेले संन्यासाश्रमाश्रित पावन रूप धरून संसारगर्तेत बुडणाऱ्या जीवांचा उद्धार करणाऱ्या हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *सर्वानन्दनिधिर्भूत्वा यतिर्दत्तो जगत्त्रयं। पावयन्नमलो भक्तानुद्धरत्यतिकष्टतः।।३।।*६१.

**मूके गां दृशमन्धके सुतनयं वन्ध्यासु चासून्मृते । सौभाग्यं विधवासु पल्लवमहो दत्तं सुशुष्केन्धने ।।**
**एवंभूत इयान्तवैष महिमा त्रैलोक्यसंस्थाक्षमो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६२।।**
**मुक्तावास मुमुक्षुकल्पविटपिन् भो कामिनां कामधुग् । दारिद्रानलमेघ दुष्कृतदवाग्रे तापिताराम ते ।।**
**श्रुत्यन्विष्टरजःपदं श्रुतविवादातीततत्त्वं महत् । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६३।।**

मूके गां, अन्धके दृशं, वन्ध्यासु सुतनयं, मृते असून्, विधवासु सौभाग्यं, सशुष्क+इन्धने पल्लवं दत्तम्। एवंभूत इयान् तव एष त्रैलोक्य+संस्था+क्षमः महिमा। (हे) श्रीनृहरे सरस्वति, ते वर श्रीपद+अब्ज+द्वयं वन्दे।६२। भो मुक्त+आवास, मुमुक्ष+कल्प+विटपिन्, कामिनां काम+धुक्, दारिद्र+अनल+मेघ, दुष्कृत+दव+अग्रे, तापित+आराम, ते श्रुति+अन्विष्ट+रजःपदं श्रुत+विवाद+अतीत+तत्त्वं महत्। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६३।

मुक्याला वाचा, आंधळ्याला दृष्टी, वंध्येला सुपुत्र, प्रेताला प्राण, शुष्क लाकडाला पालवी देणारे आपले सामर्थ्य तर आहेच; पण त्रैलोक्याचीही स्थापना करणे आपल्याला खेळ आहे. (**अक्षम**ः म्हणजे अधिक सक्षम असा अर्थ टीकेत दिला आहे.) हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *मूकाय वाचं दृशमन्धकाय ददौ वशायै तनयं मृताय। प्राणान्सुभागं च गताधवायै शुष्कद्रुमं पल्लवयन्हि दत्तः।।४।।*६२. वर *त्रिविधजनक्रीडावन* असे म्हटले त्याचे अधिक स्पष्टीकरण या श्लोकात आहे. '*निर्दोषं हि परं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः*' या भगवद्वचनानुसार (५:१९) आपण मुक्तांचे निवास्थान आहांत. मुमुक्षूंना सद्गुरुप्राप्ती, साधनमार्ग, चित्तशुद्धी, अंतरायांचा निरास, मोक्षप्राप्तीची साधने इत्यादि पुरविणारे कल्पवृक्ष आपण आहात. बहिर्मुख भक्ताच्या कामना पुरविणारी कामधेनूही आपणच आहात. दारिद्र्यरूपी अग्नीचे शामक मेघ आपणच आहात. पातकांचे वन जाळणारे दावाग्नी आपणच आहात. संसाराच्या तापांनी पोळलेल्या जीवांचा आरामही आपणच आहात. वेदही आपल्या चरणधूलीचा मागोवा घेत आहेत. मात्र आपले व्यापक पद शास्त्रांच्या विवादापलीकडे आहे. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *चिंतामणिरिवाभाति भक्तानां भक्तियोगतः। शाास्त्रवादव्यतीतात्मा श्रीदत्तो भगवान्स्वयं।।५।।*६३.

**भो योगीश्वरभावितं तव पदं तीर्थाश्रयं सज्जना- । जीवं कामिसुदैवतं च कमलालीलास्थलं निर्मलम् ।।**
**विद्वद्वादकरण्डकं सुकृतसंस्थानं महत्पावनं । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६४।।**
**वेदागोचर ते चरित्रममलं शक्तोऽत्र कः कृत्स्नशो । वक्तुं वह्न्यबिनेन्दुभूखपवनात्मेतीह मूर्त्यष्टकम् ।।**
**एतद्विश्वमयं न चान्यदिह वा ॐकाररूपेशितर्- । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ।।६५।।**

भो, तव पदं योगि+ईश्वर+भावितं, तीर्थ+आश्रयं, सज्जन+आजीवं, कामि+सुदैवतं, कमला+लीला+स्थलं, निर्मलं, विद्वत्+वाद+करण्डकं, सुकृत+संस्थानं, महत् पावनं (अस्ति)। वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम्।६४। (हे) वेद+अगोचर, अत्र ते अमलं चरित्रं कृत्स्नशः वक्तुं कः शक्तः? हे ॐकार+रूप ईशितः वह्नि+अप्+इन+इन्दु+भू+ख+पवन+आत्मा इति इह मूर्ति+अष्टकं एतत् अयं विश्वम्। न च अन्यत् वै। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे।६५।

ते पद अनेकांच्या बुद्धीचा विषय कसे झाले आहे ते सांगतात. याज्ञवल्क्यादि योगीश्वरांनी चिंतिलेले आपले पद आहे. गंगादि तीर्थांचा आपण आश्रय. गंगा तर आपल्याच चरणापासून निःसृत झाली आहे. नारायणोपनिषदाच्या प्रतिपादनानुसार आपल्या चरणांनी पवित्र झालेली तीर्थे महापाप्यांनासुद्धा तारतात. संतसज्जनांना तर आपले पद जीविकाभूत आहे. कामी जनांचे ते उत्तम दैवत आहे. लक्ष्मीचे ते विलासस्थान आहे. पापहारी आपले महान् पद विद्वानांच्या वादरूपी रत्नांची मंजूषा आहे. पुण्यार्जनाचे ते क्षेत्र आहे. *योगीचिंतितं लोकपावनं यत्पदं महत्। कामदं श्रीनिवासं च स दत्तः पुण्यशास्त्रभूः।।६।।*६४. (उपनिषदांव्यतिरिक्त) वेदांनाही अगम्य असणाऱ्या आपल्या पावक चरित्राचे वर्णन संपूर्णतया करण्याचे कुणाचे सामर्थ्य आहे? हे ॐकारस्वरूप ईश्वरा, अग्नी, जल, सूर्य, चंद्र, भूमी, आकाश, वायू आणि जीवात्मा ह्या आपल्या अष्टमूर्तींचेच हे जग बनलेले आहे. ह्या अष्टकाव्यतिरिक्त वेगळे असे इथे कुठेच कांहीच नाही. हे नरसिंह सरस्वती, अशा आपल्या श्रेष्ठ पदकमलद्वयांना वंदन असो. *आत्माप्युपनिषद्वेद्यो यल्लीलां कोऽपि वेद नो। जगन्मयाष्टमूर्त्यात्मा स दत्तः प्रभवात्मकः।।७।।*६५.

**कुण्डीदण्डकरं प्रशान्तममलं संन्यासिरूपं तव । श्रीभीमामरजायुतिस्थितमज ध्येयं शरण्यं मयि ॥**
**ज्ञानं तारकमीश सत्यमनिशं ब्रह्मन्स्थिरीकुर्वदो । वन्दे श्रीनृहरे सरस्वति वरं ते श्रीपदाब्जद्वयम् ॥६६॥**
**एवं स्तुवन्तं प्रभुराह तेऽर्पिता । तुष्टेन भक्तिर्मयि खल्वहैतुकी ।**
**भो पुत्रपौत्रादिसमस्तवंशजा । भक्ता भविष्यन्ति ममैव निश्चितम् ॥६७॥**
**इतःपरं म्लेच्छनिषेवणं जहि । स्त्रिया सुतैश्चात्र सदैव तिष्ठ भोः ।**
**द्विजोऽपि गत्वा गृहमानयत्स्त्रियं । सुतांश्च तुष्टाव जगद्गुरुं पुनः ॥६८॥**

(हे) अज, ईश, तव अदः कुण्डी+दण्ड+करं प्रशान्तं अमलं श्रीभीमा+अमरजा+स्थितं ध्येयं, शरण्यं, ज्ञानं, तारकं, सत्यं मयि अनिशं स्थिरीकुरु। श्रीनृहरे सरस्वति ते वरं श्रीपदाब्जद्वयम् वन्दे ।६६। एवं स्तुवन्तं प्रभुः आह, 'भो, (मया) तुष्टेन त्वयि अहैतुकी भक्तिः अर्पिता खलु। पुत्र+पौत्र+आदि समस्त+वंशजाः निश्चितं मम एव भक्ताः भविष्यन्ति।६७। इतः परं म्लेच्छ+निषेवणं जहि। भोः स्त्रिया सुतैः च अत्र एव सदैव तिष्ठ।' द्विजः अपि गृहं गत्वा स्त्रियं सुतान् च आनयत् पुनः जगत्+गुरुं तुष्टाव।६८।

परब्रह्मस्वरूप ईश्वरा, आपले दंड आणि कमंडलू धारण केलेले, ध्यानयोग्य, शरण्य, प्रशांत, ज्ञानमय भीमा-अमरजासंगमनिवासी यतिरूप नित्य माझ्या हृदयांत स्थिर करा. *संन्यासिरूपो श्रीदत्तो धृतदण्डकमण्डलुः। गन्धर्वस्थः सच्चिदात्मा सदा तिष्ठतु मे हृदि॥८॥*६६.

अशा प्रकारे स्तवन करणाऱ्या सांयदेवाला श्रीगुरू म्हणाले, 'सायंदेवा! मी तुझ्यावर प्रसन्न होऊन तुला निर्हेतुक (*मोक्षैकफला*) भक्ती प्रदान केली आहे. तुझे पुत्र, नातू आदि सर्व वंशज माझेच भक्त होतील.६७. यापुढे तू यवनांची चाकरी सोडून दे. तुझ्या बायकामुलांना घेऊन येऊन तू इथे गाणगापुरातच कायम राहा.' सायंदेवही कडगंचीला जाऊन आपल्या कुटुंबियांना घेऊन आला आणि पुनः त्याने श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'हे ईश्वरा ! वाच्य (रूप) आणि वाचक (नाम) या नात्याने तू जगताला व्यापले आहेस.

**त्वं वाच्यवाचकतयेश जगन्मयो वा । ॐकारवाच्य भगवन् त्रिगुणात्मकोऽसि ।**
**आद्यन्तवर्जित पुराकृतभागधेयाद् । दृष्टं त्विदन्तव परात्परसत्त्वरूपम् ।।६९।।**
**पापोऽपि पूतोऽस्मि तवाङ्घ्रिसंश्रयात् । स्पर्शाश्रयाल्लोहमपीव काञ्चनम् ।**
**तप्तोऽपि शान्तोऽस्मि मुखेन्दुदर्शनाद् । दीनोऽपि धन्योऽस्मि तव प्रसादतः ।।७०।।**

'(हे) वाच्य+वाचकतया ईशः जगत्+मयः (हे) ॐकारवाच्य भगवन् त्रिगुण+आत्मकः असि। (हे) आदि+अन्त+वर्जित, पुरा+कृत+भागधेयात् इदं तव परात्पर+सत्त्व+रूपं दृष्टम्।६९। (अहं) पापः अपि तव अङ्घ्रि+संश्रयात् स्पर्श+आश्रयात् लोहं अपि काञ्चनं इव, पूतः अस्मि। मुख+इन्दु+दर्शनात् तप्तः अपि शान्तः अस्मि। दीनः अपि तव प्रसादतः धन्यः अस्मि।'७०।

पतंजलींच्या सूत्रानुसार (१:२७) ॐकार ज्याचे वाचक आहे अशा भगवंता, आपण त्रिगुणांचे ईश्वर आहां.' 'हेच एक अक्षर ब्रह्म आहे,' (कठ उ. १:२:१६) 'हेच श्रेष्ठ आलंबन आहे,' (१:२:१७), 'पर आणि अपर ब्रह्म म्हणजेच ॐकार' (प्रश्न उ. ५:२) इत्यादि श्रुतींनी वाच्य ब्रह्म आणि त्याचा वाचक ॐकार यांची एकरूपता प्रतिपादलेली आहे. त्याकरिता सायंदेव श्रीगुरूंना जगन्मय म्हणत आहे. नाम आणि नामी यांच्यांत भेद नसल्याने तसेच ॐकार हा ब्रह्माचा विर्वत आहे आणि ब्रह्म ॐकाराचे अधिष्ठान आहे. सांयदेव पुढे म्हणतात, 'आदि आणि अंत रहित देवा, माझ्या पूर्वपुण्याईने आपल्या ह्या श्रेष्ठातिश्रेष्ठ सत्त्वस्थ रूपाचे मला दर्शन होत आहे.६९. मी पापी असलो तरी, परीसाला लागून लोखंडाचेही सोने व्हावे तसा आपल्या चरणस्पर्शांने मी पवित्र झालो आहे. त्रिविध तापांनी पोळलेला असूनही आपल्या मुखचंद्राच्या दर्शनाने मी शांत झालो आहे. दीन असूनही मी आपल्या कृपाप्रसादाने धन्य झालो आहे.'७०.

**स्तुत्वैवं श्रीगुरुं हृष्टः कारनाटकभाषया । आवतारकथोद्धातं जगौ तस्य यथाक्रमम् ।।७१।।**
**भगवान्तेन तुष्टः सन् दत्वेष्टं वरमाह तम् । अयं ज्येष्ठसुतो मान्यो धन्यस्ते मेऽतिवल्लभः।।७२।।**
**इत्युक्त्वा नागनाथस्य मूर्ध्न्यधाच्छंकरं करम् । तदैव गीष्पतिसमो वक्ता ज्ञाता बभूव सः ।।७३।।**
**सद्गुरुः प्राह विप्रं ते भार्येयं सुभगा सती । चतुरश्चतुरान्पुत्रान् लभेत्त्वमपि भाग्यभाक् ।।७४।।**
**इतः परं म्लेच्छलब्ध-वृत्तिं हित्वा कुटुम्बयुक् । तिष्ठात्रैव तव श्रेयो भवेन्मे सुप्रसादतः ।।७५।।**
**स्नात्वा स्वकैः सह तिथौ भाद्रशुद्धचतुर्दशे । अनन्तव्रतमस्त्यद्य तारकं तत्त्वमाचर ।।७६।।**

एवं श्रीगुरुं स्तुत्वा हृष्टः कारनाटक+भाषया तस्य आवतार+कथा+उद्धातं यथा+क्रमं जगौ।७१। भगवान् तेन तुष्टः सन् तं इष्टं वरं दत्वा आह। 'अयं ज्येष्ठसुतः मान्यः धन्यः मे अतिवल्लभः।'७२। इति उक्त्वा नागनाथस्य मूर्ध्नि शंकरं करं अधात्। सः तदा एव गीष्पतिसमः वक्ता ज्ञाता बभूव।७३। सद्गुरुः विप्रं प्राह, 'इयं ते सुभगा सती भार्या चतुरः चतुरान् पुत्रान् लभेत्। त्वं अपि भाग्यभाक्।७४। इतः म्लेच्छ+लब्धवृत्तिं हित्वा कुटुम्ब+युक् अत्र एव तिष्ठ। मे सुप्रसादतः तव श्रेयः भवेत्।७५। स्वकैः स्नात्वा अद्य भाद्रशुद्धचतुर्दशे तिथौ तारकं अनन्तव्रतं अस्ति, तत् त्वं आचर।'७६।

अशा रीतीने श्रीगुरूंची स्तुती करून हर्षोत्फुल्ल चित्ताने सायंदेवाने श्रीगुरूंच्या अवतारांतील लीला कर्नाटक भाषेत क्रमशः गायल्या.७१. सायंदेव वेदज्ञ ब्राह्मण असूनही वेदांतील सूक्ते किंवा पुराणातील स्तोत्रे यांनी स्तुती न करता त्याने कानडी भाषेचा का उपयोग केला? आणि देवालाही ते कसे आवडले असे कुणी म्हणेल. **पूजादि विधीत वैदिक मंत्रांची अपेक्षा आहे. ईश्वरस्तवन मात्र आपापल्या अधिकारानुसार करावे.** त्याला कांही प्रत्यवाय नाही. उलट ईश्वराची प्रसन्नताच लाभते. कारण ईश्वराला प्रेमाची आवड असते. तो भक्तीनेच प्रसन्न होतो.

श्रीगुरू भगवान् प्रसन्न झाले आणि सायंदेवाला इष्ट वर देऊन म्हणाले, 'हा तुझा वडील मुलगा धन्य आहे. तो सर्वमान्य होईल. हा मला अतिशय प्रिय आहे.'७२. असे म्हणून त्यांनी त्या नागनाथाच्या मस्तकावर हात ठेवला. तो तत्क्षणीच बृहस्पतीसमान वक्ता आणि ज्ञाता झाला.७३.

**धर्मः कृष्णोपदेशेन चरित्वा यद्व्रतं महत् । दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वागात्सतनुर्दिवम् ।।७७।।**

**।। सायंदेव उवाच ।।**

**भवान्देवोऽस्ति नोऽनन्तो भवत्सेवाव्रतं परम् । तथापि श्रोतुमिच्छामि को धर्मः कीदृशं व्रतम् ।।७८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**धर्मोऽभूत्पाण्डवो राजा तत्सदस्यां सुयोधनः । मायाभ्रान्त्यापतन्मानी व्रीडितो जनहास्यतः ।।७९।।**

'धर्मः यत् महत् व्रतं कृष्ण+उपदेशेन चरित्वा दिव्यं सौख्यं सार्वभौमं भुक्त्वा सतनुः दिवं अगात्।'७७। सायंदेव उवाच। 'भवान् नः देवः अस्ति। भवत्+सेवा परं व्रतं (चि अस्ति)। तथापि (अहं) कः धर्मः, कीदृशं व्रतं, श्रोतुं इच्छामि।'७८। श्रीगुरुः उवाच। 'धर्मः पाण्डवः राजा अभूत्। तत् सदस्यां मानी सुयोधनः माया+भ्रान्त्या अपतत्। जन+हास्यतः व्रीडितः।७९।

सद्गुरू सायंदेवाला म्हणाले, 'ही तुझी भाग्यवती आणि पतिव्रता स्त्री चार बुद्धिमान् पुत्रांची आई होईल. तूसुद्धा भाग्यशाली आहेस.७४. यापुढे उपजीवेकेसाठी यवनांची सेवा करू नकोस. तू तुझ्या कुटुंबासह इथे गाणगापुरातच राहा. माझ्या प्रसादाने तुझे कल्याण होईल. ७५.आज भाद्रपद शुद्ध चतुर्दशी आहे. तरी तू आपल्या परिवारासह स्नानादि करून तारक अशा अनंतव्रताचे आचरण कर.'७६. धर्मराजाने श्रीकृष्णाच्या उपदेशाने हे महान् व्रत केले. त्याच्या प्रभावाने दिव्य सौख्याचा आणि सार्वभौम राज्याचा उपभोग घेऊन सदेह स्वर्गाला गेला.७७. सायंदेवांनी विचारले, 'आमचे तर आपणच देव आहात आणि आपली सेवा हेच आमचे परम व्रत आहे. तरीही मला हे जाणण्याची इच्छा आहे की हा धर्मराजा कोण? आणि हे व्रत कसे करतात?'७८. श्रीगुरू उत्तरले, 'धर्म पण्डूचा पुत्र राजा होता. एकदा त्याच्या मयासुराने निर्मिलेल्या सभेत दुर्योधन मायेच्या भुलीने पाण्याला भूमी, भूमीला पाणी, दाराला भिंत आणि भिंतीला दार समजून पडला. तेव्हा झालेला उपहास मानी सुयोधनाच्या जिव्हारी लागला.७९.

**जित्वा द्यूतमिषाद्धर्मं हृततच्छ्रीः स सानुजम् । वनाय प्रेरयत्सोऽपि तत्र गत्वा सुदुःखितः ।।८०।।**
**स एकदागतं कृष्णं नत्वा सस्त्र्यनुजोऽब्रवीत् । त्वन्नस्त्रातेति बिरुदं वहन्नोऽकं न वेत्सि किम् ।।८१।।**

**।। श्रीकृष्ण उवाच ।।**

**बलवद्दैवमपि मां भजतां नेक्षते सदा । त्वं मद्भक्तोऽपि मद्वाक्यात् कुर्वनन्तव्रतं महत् ।।८२।।**
**कोऽनन्तस्तद्व्रतं कीदृक् पुरा केन कृतं वद । इति धर्मानुयोगं स श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे ।।८३।।**

सः द्यूत+मिषात् धर्मं स+अनुजं जित्वा हृत+तत्+श्रीः वनाय प्रेरयत्। सः अपि तत्र सुदुःखितः।८०। सः एकदा आगतं कृष्णं स+स्त्री+अनुजः नत्वा अब्रवीत्। त्वं नः त्राता इति बिरुदं वहन् नः अकं न वेत्सि किम्?'८१। श्रीकृष्ण उवाच। 'सदा मां भजतां बलवत् दैवं अपि न ईक्षते। (तथा) अपि त्वं मत् भक्तः। मत् वाक्यात् महत् अनन्तव्रतं कुरु।'८२। 'कः अनन्तः? कीदृक् व्रतं?' इति धर्म+अनुयोगं श्रुत्वा सः वक्तुं प्रचक्रमे।८३।

त्याने धर्मराजाला कपटद्यूताने हरवले आणि त्याचे राज्य आणि संपत्ती हिरावून घेऊन त्याला बंधूंसहित बारा वर्षांच्या वनवासाला पाठविले.८०. तेव्हा तिथे वनवासाचे कष्ट भोगणाऱ्या पांडवांना भेटायला श्रीकृष्ण आले असता धर्मराजाने त्याला आपल्या बांधवांसहित नमस्कार केला आणि त्याला विचारले, 'अरे कृष्णा पांडवांचा कैवारी अशी बिरुदावली मिरवतोस; पण तुला आमचे दुःख दिसत नाही का?'८१. श्रीकृष्ण म्हणाले, 'जो निरंतर निर्विकल्प स्थितीत माझ्या भजनात निमग्न असतो त्याच्याकडे दैव कितीही बलवत्तर असले तरी पाहातसुद्धा नाही. कारण दैवाची प्रतिकूलता जाणवण्यासाठी देहतादात्म्य असावे लागते. 'ज्यांचे वासनाजाल निःशेष लय पावले आहे आणि ज्यांच्या पापपुण्यांचा सांठा मुळासह उखडलेला आहे' (पंचदशी १:६१) त्यांच्याकडे दैवाचा दृष्टिक्षेपही होत नाही. अरे, युधिष्ठिरा, तुझी सध्या ती अवस्था नसली तरी तू माझा भक्तच आहेस. तरी तू माझ्या सांगण्यानुसार महान अशा अनंतव्रताचे अनुष्ठान कर.८२. धर्मराजाने विचारले, 'कोण हा अनंत? आणि त्याचे व्रत कसे करावयाचे?' तेव्हा श्रीकृष्णांनी उत्तर दिले.८३.

**चराचरजगत्काल-भूताद्यात्माप्यहं विभुः । कर्मप्रयोजनगुणैर्भूपानन्तोऽस्म्यहं पृथक् ।।८४।।**
**भाद्रशुक्लचतुर्दश्यामनन्तव्रतमुत्तमम् । व्रतिनोऽनन्तफलदं तत्कुर्विष्टमवाप्स्यसि ।।८५।।**
**ऋषिः सुमन्तुः प्रागासीद् वासिष्ठो गौतमीपतिः । तत्स्त्रीः कन्यां प्रसूयैकां मृतान्योद्वाहितामुना ।।८६।।**
**सा दुःशीला कलिद्वेष-प्रिया चण्डी पतिं सुताम् । क्रूरा तौ त्रासयामास कन्यापि ववृधे शुभा ।।८७।।**

'(हे) भूप, अहं विभुः कर्म+प्रयोजन+गुणैः चर+अचर+जगत्+काल+भूत+आदि+आत्मा अपि अहं पृथक् अनन्तः अस्मि।८४। उत्तमं अनन्तव्रतं भाद्र+शुक्ल+चतुर्दश्यां व्रतितं अनन्त+फलदम्। तत् कुरु, इष्टं अवाप्स्यसि।८५। प्राक् सुमन्तुः वासिष्ठः ऋषिः गौतमी+पतिः आसीत्। तत् स्त्रीः एकां कन्यां प्रसूय मृता। अमुना अन्या उद्वाहिता।८६। सा दुःशीला कलि+द्वेष+प्रिया चण्डी क्रूरा तौ पतिं सुतां त्रासयामास। शुभा कन्या अपि ववृधे।८७।

'माझ्या व्यापकत्वाने हे सर्व चराचर जगत्, काल, सर्व जीव इत्यादि मीच झालो आहे. कर्म, प्रयोजन, गुण वगैरेंनी मीच हे सर्व करूनसुद्धा मी वेगळाच आहे. पुरुषसूक्तांत (ऋग्वेद संहिता १०:९०:३) म्हणाल्याप्रमाणे ह्या सर्वापेक्षाही अधिक श्रेष्ठ मी आहे. (*अतो ज्यायाँश्च पुरुषः... पादोऽस्य विश्वा भूतानि*) गीतेतही (१०:४१) माझे प्रतिपादन आह की मी माझ्या एका अंशाने हे सर्व विश्व धारण करून राहिलो आहे (*विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्।*), म्हणूनच काल, देश इत्यादि परिच्छेदरहित अनंत तो मीच आहे.'८४. 'हे उत्तम असे अनंतव्रत भाद्रपद शुक्ल चतुर्दशीला केले असता अनंत फल प्राप्त होते. ते तू कर म्हणजे तुला तुझे इष्ट प्राप्त होईल.'८५. पूर्वी सुमन्तु नावाचे एक वासिष्ठ गोत्रीय ऋषी होते. त्यांच्या पत्नीचे नाव गौतमी असे होते. तिने एका मुलीला जन्म दिला आणि ती कालवश झाली. गृहस्थाश्रमाच्या निर्वाहासाठी त्या ऋषींनी दुसरा विवाह केला.८६. ती दुष्ट, संतापी, भांडकुदळ, आकस धरणारी आणि क्रूर स्वभावाची होती. ती पतीचा आणि कन्येचाही छळ करू लागली. ती सुस्वभावी कन्या मात्र वाढू लागली.८७.

**चित्रक्रियापटुं सोऽदात् सच्छीलगुणलक्षणाम् । कौण्डिण्याय स्वगृह्योक्त-ब्राह्मोद्वाहविधानतः ।।८८।।**
**तत्र श्वशुरवात्सल्यात् स्थित्वा मासद्वयं मुनिः । श्वश्रूत्रस्तो ययौ वध्वा कौण्डिण्यः श्वशुराज्ञया ।।८९।।**
**चण्ड्यारारं दृढं बध्वा पाथेयं नार्पितं स तु । प्रादाद्बहिस्थगोधूम-पुलाकं तौ ततो गतौ ।।९०।।**
**मध्याह्ने तस्थतुर्नद्यां चिरण्टीः प्रेक्ष्य तत्र सा । गत्वार्चयन्तीः प्राहेदं युष्माभिः क्रियते किमु ।।९१।।**

सः चित्र+क्रिया+पटुं सत्+शील+गुण+लक्षणां (कन्यां) कौण्डिण्याय स्व+गृह्य+उक्त+विधानतः अदात्।८८। श्वशुर+वात्सल्यात् मुनिः तत्र मास+द्वयं स्थित्वा कोण्डिण्यः श्वश्रू+त्रस्तः वध्वा श्वशुर+आज्ञया ययौ।८९। चण्ड्या अररं दृढं बध्वा पाथेयं न अर्पितम्। सः तु बहिस्थ गोधूम+पुलाकं अदात्। ततः तौ गतौ।९०। मध्य+अह्ने नद्यां तस्थतुः। तत्र सा अर्चयन्तीः चिरण्टीः प्रेक्ष्य गत्वा प्राह, 'इदं युष्माभिः किं उ क्रियते?'९१।

त्या चित्रकलाकुशल, सुशील, गुणी आणि सुलक्षणी मुलीला सुमंतूंनी आपल्या गृह्यसूत्रानुसार ब्राह्म विवाहाने कौंडिण्य ऋषींना दिली.८८. विवाहानंतर सासऱ्यांच्या आग्रहाने मुलगी आणि जावई तिथे राहिले. पण नंतर सासूच्या छळाला कंटाळून कोंडिण्य मुनी सासऱ्यांची अनुज्ञा घेऊन तिथून सपत्नीक निघाले.८९. त्या वेळी सुमंतूच्या त्या क्रोधी पत्नीने घरातील कपाटांना कुलूपे लावून लेक-जावयांना काहीच शिदोरी दिली नाही. सुमंतू ऋषींनी बाहेर पडलेला गव्हाचा कोंडा तेवढा बांधून देऊन लेक आणि जांवई रवाना झाले.९०. दुपारच्या वेळी ते एका नदीकाठी थांबले असता त्या कन्येने तिथे कांही सुवासिनी मिळून पूजा करताना पाहिल्या. तेव्हा तिने त्यांच्याजवळ जाऊन विचारले, 'तुम्ही सर्वजणी हे काय करीत आहांत?'९१ 'हे अनंतव्रत अनंत फल देते' हा अर्थवाद आहे. चातुर्मास्याच्या फलाप्रमाणे केवळ प्रशंसा करणे हाच त्याचा उद्देश्य आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. अर्थवाद तीन प्रकारचे आहेत. वास्तव्याशी विरोध असेल तर तो गुणवाद होतो, दुसऱ्या प्रमाणांशी सुसंगत असेल तर अनुवाद होतो आणि वस्तुनिष्ठ असेल तर भूतार्थवाद होतो (*विरोधे गुणवादः स्यादनुवादोऽवधारिते। भूतार्थवादस्तद्धानादर्थवादस्त्रिधा मतः।।*). 'यूप (यज्ञस्तंभ) हा आदित्य आहे' या विधानांत सूर्याची तेजस्विता गुण यूपांत आहे असा भावार्थ आहे.

**।। स्त्रिय ऊचुः ।।**

**भाद्रशुद्धचतुर्दश्यामद्यानन्तव्रतं शृणु । स्नात्वा रक्ताम्बरं धृत्वा रक्तसूत्रे चतुर्दश ।।९२।।**
**ग्रन्थीन्बध्वा सप्तफण-दर्भशेषे निधाय तम् । कुम्भोपरि चतुर्बाहुं ध्यात्वानन्तं प्रपूज्य च ।।९३।।**

स्त्रियः ऊचुः। अद्य भाद्र+शुद्ध+चतुर्दश्यां अनन्तव्रतम्। शृणु। स्नात्वा रक्त+अम्बरं धृत्वा, रक्त+सूत्रे चतुर्दश ग्रन्थीन् बध्वा सप्त+फण+दर्भ+शेषे निधाय कुम्भ+उपरि चतुः+बाहुं अनन्तं ध्यात्वा, प्रपूज्य च,।९२-९२।

वस्तुतः यूप वेगळा आणि सूर्य वेगळा. हे गुणवादाचे उदाहरण आहे. 'अग्नी हे थंडीचे औषध आहे' ह्या विधानाची इतर प्रमाणांनी पुष्टी होते म्हणून तो अनुवाद ठरतो. भूतार्थवादांत विधानाची आणि इतर प्रमाणांची अर्थशः एकवाक्यता असते. चराचर जगताशी एकरूप असूनही त्याहून अधिक आणि वेगळे स्वरूप असणारा अनंत इथे उपास्य म्हणून प्रतिपादलेला आहे. त्यामुळे त्याची प्राप्ती ह्या फळाचे आनंत्य त्याच्याशी सुसंगत आहे. म्हणून हा भूतार्थवाद होतो. अनंत फळ याचा अर्थ एकाच वेळी सर्व कामांची पूर्णता. ही फक्त आत्मानुभवातच होते. तैत्तिरीय उपनिषदाचे (२:१:१) वचन आहे की, 'गहन अंतरांतल्या सत्य, ज्ञान, अनंत अशा ब्रह्माला जाणणाऱ्याच्या सर्व कामांची पूर्ती होते.' अज्ञानी पुरुष एकामागून एक कर्मफलांनी मिळालेली शरीरे धारण करून डोळे, कान इत्यादि उपाधींच्या माध्यमांतून, पाण्यातल्या सूर्यासारख्या जीवरूपाने त्या त्या भोगांचा अनुभव घेतो. ज्ञानी मात्र सर्व सुखभोग एकाच वेळी अनुभवतो. असे फळ अनंतव्रताने लाभत असल्याने ते अनंत व्रत आहे. चातुर्मास्याप्रमाणे केवळ प्रशंसात्मक अक्षय्य फळ नाही.

त्या स्त्रिया तिला म्हणाल्या, 'आज भाद्रपद शुक्ल चतुर्दशी असून हा अनंतव्रताचा नियत दिवस आहे. ते कसे करायचे ते ऐक. स्नान करून लाल वस्त्र परिधान करावे. मग लाल दोरकाला चौदा गाठी बांधून, तो पाण्याने भरलेल्या कलशावर ठेवलेल्या सात फणांच्या दर्भाच्या शेषावर स्थापन करावा. त्याच्यावर चतर्भुज अनंताचे ध्यान करून त्याची पूजा करावी.९२-९३.

**दत्वा चतुर्दशापूपान् ब्रह्मणे जीर्णदोरकम् । विसृज्य दत्वा नूत्नं स्वे बध्वा हस्ते च दम्पती ।।९४।।**
**संतर्प्याब्दे घटान्दद्याच् चतुर्दश चतुर्दशे । प्रत्यब्दं पूजयेद् भक्त्या वरं नातः परं व्रतम् ।।९५।।**
**कुर्वदोऽभीष्टदमपि प्रोक्त्वास्यै दोरकं ददुः । सापि तत्र व्रतं कृत्वा पतिं प्राप सदोरका ।।९६।।**
**ततो यान्तौ धनी कश्चिद् ग्रामं नीत्वा श्रियं ददौ । तत्रानन्तप्रसादात्तौ श्रीमानाढ्यौ बभूवतुः ।।९७।।**
**दोरं दृष्ट्वैकदाग्नौ स जहौ मत्वा वशीकृतिम् । श्रीदानन्तं न त्यजेति वारितोऽपि तया ऋषिः ।।९८।।**

ब्रह्मणे चतुर्दश अपूपान् दत्वा, जीर्ण+दोरकं विसृज्य दत्वा, नूत्नं स्वे हस्ते बध्वा च, दम्पती संतर्प्य,।९४। चतुर्दशे अब्दे चतुर्दश घटान् दद्यात्। प्रति+अब्दं भक्त्या पूजयेत्। अतः परं व्रतं न।९५। अभीष्ट+दं अपि इदं कुरु। इति प्रोक्त्वा अस्यै दोरकं ददुः। सा अपि तत्र व्रतं कृत्वा सदोरका पतिं प्राप।९६। ततः यान्तौ कश्चित् धनी ग्रामं नीत्वा श्रियं ददौ। तत्र तौ अनन्त+प्रसादात् श्रीमान् आढ्यौ बभूवतुः।९७। एकदां दोरं दृष्ट्वा वशी+कृतिं मत्वा सः ऋषिः, तया 'श्री+द+अनन्तं न त्यज'इति वारितः अपि, अग्नौ जहौ।९८।

त्याला चौदा अपूपांचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणाला द्यावेत. जुन्या (आधीच्या वर्षाच्या) दोरकाचे विसर्जन करून तो ब्राह्मणाला दान करावा आणि नवा पूजा केलेला दोरक हातात बांधावा. अनंताप्रीत्यर्थ एका दंपतीला भोजन घालावे.९४. असे चौदा वर्षे व्रत केल्यावर चौदा घटांचे दान करून उद्यापन करावे. यापेक्षा श्रेष्ठ व्रत नाही.९५. हे आपले अभीष्ट प्राप्त करून देणारे व्रत आहे. तूसुद्धा हे व्रत कर.' असे म्हणून त्यांनी तिलाही एक दोरक दिला. तिनेही ते व्रत केले आणि दोरक हातात बांधून पतीकडे आली. इतर व्रतात स्त्रियांना स्वातंत्र्य नसले तरी परमार्थांत मात्र त्यांना स्वातंत्र्य आहे असे इथे दिसते. अन्यथा देवाचा प्रसाद कसा होईल?९६. तिथून पुढे जात असता कुणी एका धनवान् गृहस्थाने त्यांना आपल्या गावात नेऊन खूपशी संपत्ती दिली. तिथे अनन्ताच्या कृपाप्रसादाने ते संपन्न आणि प्रतिष्ठित झाले.९७. एकदा कौंडिण्य ऋषींनी पत्नीच्या हातातला तो दोरा पाहिला आणि हा कांही वशीकरणाचा प्रकार आहे अशा समजुतीने, पत्नी 'अहो वैभव देणारा अनंत टाकू नका' अशी विनवणी करूनही त्या मुनींनी आगीत टाकून दिला.९८.

**तदाहृताग्न्यरिभ्यः श्रीस् ततोऽनन्तं स्मरन्नटन् । वनेऽनन्तः क्वेति स गो-द्रुगाः पृष्ट्वाप कश्मलम् ।।९९।।**
**तस्मै नीत्वा वृद्धविप्र-रूपेण पुरमद्भुतम् । स्वं रूपं दर्शयामास तुष्टावानन्तमप्यसौ ।।१००।।**
**जय सर्वेश्वरानन्त विश्वव्यापिन्जनार्दन । त्वन्मायामोहितधिया कृतान्मन्तून्क्षमस्व मे ।।१०१।।**

**।। श्रीमदनन्त उवाच ।।**

**न दैन्यं दुष्कृतं तेऽत्र श्रियं भुक्त्वा पुनर्वसुः । नक्षत्रेषु प्रसादान्मे भविष्यसि महामुने ।।१०२।।**

तदा अग्नि+अरिभ्यः श्रीः हृतः। ततः सः अनन्तं स्मरन् वने अटन् 'अनन्तः क्व?' इति गो+द्रु+गाः पृष्ट्वा कश्मलं आप।९९। तस्मै वृद्ध+विप्र+रूपेण अद्भुतं पुरं नीत्वा स्वं रूपं दर्शयामास। असौ अपि अनन्तं तुष्टाव।१००। '(हे) ईश, भगवन् त्वं वाच्य+वाचक+तया जगत्+मयः ॐकार+वाच्य त्रिगुण+आत्मकः असि। (हे) सर्व+ईश्वर, विश्व+व्यापिन्, जनार्दन, त्वत्+माया+मोहित+धिया कृतान् मे मन्तून् क्षमस्व।'१०१। श्रीमत् अनन्त उवाच। 'ते दैन्यं दुष्कृतं न। (हे) महामुने, अत्र श्रियं भुक्त्वा मे प्रसादात् नक्षत्रेषु पुनर्वसुः भविष्यसि।'१०२।

तेव्हा अनंताच्या कोपाने त्यांची सर्व संपत्ती अग्नी आणि शत्रू यांनी हिरावून घेतली. तेव्हा 'हा अनंताचाच कोप आहे,' असे जाणून तो कौंडिण्य अनंताचे स्मरण करीत, 'अनंत मला कुठे भेटेल?' असे बैल, वृक्ष, गाय यांना विचारीत वनात भटकता भटकता मूर्च्छित झाला.९९. तेव्हा अनंतदेवाला दया येऊन त्यांनी त्याला सावध करून त्याला धीर देऊन एका अद्भुत नगरीत नेले आणि आपले स्वरूप दाखविले. ऋषींनी त्यांचे स्तवन केले.१००. भगवंता, ईश्वरा, वाच्य आणि वाचक तूच असल्याने तू जगताला व्यापून उरला आहेस. तूंच ॐकाराचा अर्थ आहेस आणि त्रिगुणात्मक आहेस. जनार्दना, तुझ्याच मायेने भुलून मी केलेल्या अपराधांची क्षमा कर.१०१. श्रीमत् अनन्तांनी त्याला वर दिला, 'तुला दैन्य आणि पाप लागणार नाहीत. इहजन्मी वैभव भोगून तू माझ्या प्रसादाने नक्षत्रमंडलांत पुनर्वसु होशील.'१०२.

**॥ ऋषिरुवाच ॥**

**केऽपि सत्फलिताम्रस्य फलं नाश्नन्ति गोर्मुखे । तृणं नैति पशोश्चापि स्वाद्वप्पूर्णे सरोवरे ॥१०३॥**
**जीवास्पृष्टेऽग्रतो दीनौ खरेभौ च द्विजो जरन् । एते दृष्टा मयैतेषां कुतोऽभूदीदृशी स्थितिः ॥१०४॥**

**॥ श्रीमदनन्त उवाच ॥**

**शिष्यान्नापाठयन्मत्तो विद्वांस्तेनाम्र ईदृशः । गौर्जाता मोघभूदानाद् वृषोऽदाताभवद्धनी ॥१०५॥**
**अन्योन्यदानग्रहणादीदृश्यौ स्तः सरस्युभे । खरः क्रोधीभो मदी च द्विजोऽहं तेऽपि मोचिताः ॥१०६॥**

ऋषिः उवाच। 'सत्+फलित+आम्रस्य फलं के अपि न अश्नन्ति। गोः मुखे तृणं न एति पशोःअपि। स्वादु+अप्+पूर्णे सरोवरे जीव+अस्पृष्टे।१०३। अग्रे दीनौ खर+इभौ, जरत् द्विजः च। एते मया दृष्टाः। एषां ईदृशी स्थितिः कुतः अभूत्?'१०४। श्रीमत् अनन्त उवाच। 'मत्तः विद्वान् शिष्यान् न अपठयन् तेन ईदृशः आम्रः। मोघ+भू+दानात् गौः जाता। अदाता धनी वृषः अभवत्।'१०५। उभे अन्यः+अन्य+दान+ग्रहणात् सरसि स्तः। क्रोधी खरः, मदी च इभः। अहं द्विजः। ते अपि मोचिताः।'१०६।

ऋषींनी अनन्ताला विचारले, 'मी येताना एक आंबा पाहिला. तो उत्तम फळांनी लखडलेला असूनही त्याची फळे कुणीच खात नाहीत. तसेच पुढे एक गाय पाहिली. तिच्या व पशूंच्या तोंडात गवतच येत नाही. पुढे गोड पाण्याने भरलेल्या दोन तळ्या पाहिल्या. त्यांना कुठलेही जीव स्पर्शत नव्हते.१०३. पुढे दीनवाणे दिसणारे एक गाढव व एक हत्ती पाहिले. आणि एक वृद्ध ब्राह्मण पाहिला. त्यांची ही अशी अवस्था का झाली?'१०४. श्रीमत् अनन्तदेव म्हणाले, 'आपल्या विद्वत्तेच्या मदात शिष्यांना न शिकवल्याने तो विद्वान् असा आम्रवृक्ष झाला. नापीक जमिनीचे दान करणारी या गाईच्या जन्माला आली. धनवान् असूनही दान न केल्याने बैल झाला.१०५. दोघींनी आपापसांतच दान दिले-घेतले म्हणून त्या ह्या तळ्या झाल्या. क्रोधी माणसाला गाढवाचा, मदोन्मत्ताला हत्तीचा जन्म मिळाला. तो वृद्ध मीच होतो. या सर्व तू पाहिलेल्या जीवांना मुक्ती दिली.'१०६.

**इति लब्धवरोऽनन्तं नत्वैत्य स तथाभवत् । तस्माद्व्रतोत्तमं धर्म व्रतं चर हितं भवेत् ।।१०७।।**
**इति कृष्णोऽब्रवीत्सोऽपि व्रतं कृत्वा हताहितः । अकण्टकं चिरं राज्यमृद्धं भुक्त्वामृतं ययौ ।।१०८।।**
**त्वमप्याचर विप्रेदमत्रामुत्रापि सौख्यदम् । इत्युक्तः प्रभुणानन्त-व्रतं चक्रे द्विजोत्तमः ।।१०९।।**
**तत्र स्थित्वा स्वकैः सार्धं प्रेत्य सायुज्यमाप्तवान् । तद्वंशजा अपि गुरोः प्रसादात्तादृशोऽभवन् ।।११०।।**

'इति लब्ध+वरः सः अनन्तं नत्वा एत्य तथा अभवत्। तस्मात् (हे) धर्म, व्रतं चर हितं भवेत्।'१०७। इति कृष्णः अब्रवीत्। सः अपि व्रतं कृत्वा हत+अहितः अकण्टकं चिरं ऋद्धं राज्यं भुक्त्वा अमृतं ययौ।१०८। '(हे) विप्र त्वं अपि अत्र अमुत्र अपि सौख्यदं (व्रतं) आचर।' इति प्रभुणा उक्तः द्विजउत्तमः अनन्तव्रतं चक्रे।१०९। स्वकैः सार्धं तत्र स्थित्वा प्रेत्य सायुज्यं आप्तवान्। तत् वंशजाः अपि गुरौः प्रसादात् तादृशाः अभवन्।११०।

'असा वर पावून त्या कौंडिण्याने अनन्ताला नमस्कार केला. घरी परत येऊन त्याप्रमाणेच सिद्धी मिळाली. यासाठी, हे धर्मराजा, तू हे महान् व्रत कर. तुझे कल्याण होईल!'१०७. असा श्रीकृष्णाचा आदेश झाल्याप्रमाणे त्याने अनंतव्रत केले. त्यायोगे त्याने शत्रूचा नाश करून अकंटक आणि समृद्ध राज्य दीर्घकाल उपभोगले आणि अंती मोक्ष पावला.१०८. श्रीगुरू सायंदेवाला सांगतात, 'ब्राह्मणा, तूसुद्धा ह्या इह आणि परत्र सुख देणाऱ्या व्रताचे आचरण कर.' अशी श्रीगुरूंची आज्ञा घेऊन त्या ब्राह्मणवर्याने अनंतव्रत केले.१०९. आपल्या कुटंबासह तिथे गाणगापुरांत राहून मृत्यूनंतर सायुज्य मुक्तीचा धनी झाला. त्याचे वंशजही श्रीगुरूंच्या प्रसादाने त्याच्यासारखेच झाले.११०.

**त्वमपीदृक्तत्प्रसादाद् भक्तिमानसि सद्गुरौ । मा भीस्तरिष्यसि भवं मृगतृष्णोपमं द्रुतम् ।।१११।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।**

**आदितः विंशोऽध्यायः ।।**

त्वं अपि तत्+प्रसादात् ईदृक् सत्+गुरौ भक्तिमान् असि। मा भीः। मृग+तृष्ण+उपमं भवं द्रुतं तरिष्यसि।१११।

नामधारका, तूही त्यांच्याप्रमाणेच सद्गुरूंच्या भक्तीने संपन्न आहेस! भिऊ नकोस! हा मृगजळासारखा संसारसागर तू सहज तरून जाशील.'

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा दुसरा आणि प्रथमपासून विसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथैकविंशोऽध्यायः ।।

।। नामधारक उवाच ।।

**साधूदितं चरित्रं भो प्रभोर्धन्यं दिनं त्विदम् । क्षणमात्रोऽपि कालोऽद्य नातीतस्तत्कथामृते ।।१।।**

।। सिद्ध उवाच ।।

**तन्तुको नाम भक्तोऽभूत् त्रियामं भगवत्प्रियः । संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तमाभजत् ।।२।।**
**तद्बन्धुता कदाचित्तं श्रीशैलं गन्तुमाह्वयत् । स प्राह मे मठः शैलः श्रीगुरुर्मल्लिकार्जुनः ।।३।।**

नामधारक उवाच। भोः प्रभोः चरित्रं साधु उदितम्। इदं दिनं तु धन्यम्। अद्य क्षणमात्रः अपि कालः तत् कथां ऋते न अतीतः।१। सिद्ध उवाच। तन्तुकः नाम भगवत्+प्रियः भक्तः अभूत्। त्रियामं संसारयात्रां निस्तीर्य याममात्रं तं आभजत्।२। कदाचित् तत् बन्धुता तं श्रीशैलं गन्तुं आह्वयत्। स प्राह, 'मठः मे शैलः, श्रीगुरुः मल्लिक+अर्जुनः'। 'कुतः न इतः असि' इति अजेन पृष्टः अपि पूर्ववत् प्राह।३।

नामधारक म्हणाला, 'आपण श्रीगुरुप्रभूंचे चरित्र फार उत्तम सांगितले. आजचा दिवस खरोखर धन्य आहे! क्षणभरसुद्धा आज श्रीगुरूंच्या कथेवाचून गेला नाही.'१. सिद्धमुनींनी सांगायला सुरुवात केली. 'तन्तुक नावाचा श्रीगुरूंना प्रिय असलेला एक शिष्य होता. तो दिवसाचे तीन प्रहर आपले सांसारिक कर्तव्य पार पाडून एक प्रहर (तीन तास) श्रीगुरूंची सेवा करीत असे.'२. एकदा त्याची भावकी श्रीशैल्याच्या यात्रेला निघाली. तेव्हा त्यालाही आपल्याबरोबर येण्याचा त्यांनी आग्रह केला. तो म्हणाला, 'गाणगापूरचा हा मठ हेच माझे श्रीशैल्य आहे; आणि श्रीगुरू हेच माझे मल्लिकार्जुन आहेत.'३.

**सा तं निषिध्य मूर्खोऽयमिति मत्वा ययौ नगम् । कुतो नेतोऽसीत्यजेन पृष्टोऽपि प्राह पूर्ववत् ।।४।।**
**ततो माघेऽल्पकालेन शिवरात्रिरुपस्थिता । मध्याह्ने तद्दिनेऽजस्तं प्राह शैलोत्सवोऽद्य सन् ।।५।।**

**।। तन्तुक उवाच ।।**

**त्वत्पादाब्जोत्सवान्मन्ये क्वापि नास्त्यधिकोत्सवः । इदं प्रत्यक्षमज्ञाय मुधा मुग्धा भ्रमन्ति कौ ।।६।।**
**तच्छ्रुत्वा प्राह भगवान्मा ब्रूहीदं जगत्प्रभुः । सर्वत्रावस्थितोऽप्येष सत्क्षेत्रमहिमा वरः ।।७।।**
**महातपस्विभिः क्षेत्रं पवित्रीकृतमस्ति तत् । परमात्मा तत्प्रभावात् तत्र जागर्त्यनारतम् ।।८।।**

सा तं निषिध्य, 'अयं मूर्खः' इति मत्वा नगं ययौ।४। ततः अल्प+कालेन माघे शिवरात्रिः उपस्थिता। तत् दिने मध्य+अह्ने अजः तं प्राह। अद्य शैल+उत्सवः सन्।५। तन्तुक उवाच। त्वत्+पाद+अब्ज+उत्सवात् अधिकः क्व अपि उत्सवः न अस्ति। इदं प्रत्यक्षं अज्ञाय मुग्धा मुधा कौ भ्रमन्ति।६। तत् श्रुत्वा भगवान् प्राह। इदं मा ब्रूहि। जगत्+प्रभुः सर्वत्र अवस्थितः अपि एष सत्+क्षेत्रमहिमा वरः।७। क्षेत्रं महा+तपस्विभिः पवित्री+कृतं अस्ति। तत् तत्+प्रभावात् परमात्मा तत्र अनारतं जागर्ति।८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'आपल्या बांधवांसह श्रीशैल्याला का गेला नाहीस?' तेव्हाही त्याने पूर्वीप्रमाणेच उत्तर दिले.४. पुढे थोड्याच काळाने माघ महिन्यात शिवरात्र आली. त्या दिवशी माध्याह्नी श्रीगुरू म्हणाले, 'आज श्रीशैल्याचा मोठा उत्सव आहे.'

तन्तुक उत्तरला, 'आपल्या चरणकमलांपेक्षा मोठा उत्सव कुठेच नाही. हे प्रत्यक्ष सोडून अज्ञानी लोक उगीच पृथ्वीवर भटकत असतात.'६. त्याचे बोलणे ऐकून श्रीगुरुभगवान म्हणाले, 'असे बोलू नकोस. जगाचा स्वामी सर्वत्रच आहे हे खरे आहे. पण पुण्यक्षेत्रांचा महिमा थोर आहे.७. क्षेत्र महान् तपस्व्यांनी आपल्या वास्तव्याने पवित्र केलेले असते. म्हणून त्यांच्या प्रभावाने तिथे परमेश्वर निरंतर जागत असतो.८.

**अतस्तत्रैव भजतां कार्यसिद्धिर्भवत्यरम् । महातपस्विनो धन्याः स्वयं मुक्ता अपीतरान् ।।९।।**
**मोचयन्ति स्वतपसा जन्मसंसारबन्धनात् । लोकोद्धृत्यै प्रजायन्ते सत्तपस्विविभूतयः ।।१०।।**
**तत्संचारस्थलरजः-संस्पर्शोऽप्यत्र मुक्तये । अतस्तत्सेवितक्षेत्रे लोको यास्यति सादरम् ।।११।।**
**एह्यद्य योगगत्याद्रिं गत्वा ते दर्शयामि तत् । इत्युक्त्वा पादुके दिव्ये धारयित्वा दृढं दृशौ ।।१२।।**
**निमीलयित्वा श्रीशैलं सह तेन ययौ क्षणात् । प्राहोन्मील्य दृशौ पश्य श्रीशैलममुमित्यजः ।।१३।।**

अतः तत्र एव भजतां अरं कार्य+सिद्धिः भवति। महा+तपस्विनः धन्याः। स्वयं मुक्ताः अपि इतरान्..।९। स्व+तपसा जन्म+संसार+बन्धनात् मोचयन्ति। सत्+तपस्वि+विभूतयः लोक+उद्धृत्यै प्रजायन्ति।१०। 'तत् संचार+स्थल+रज+स्पर्शः अपि अत्र मुक्तये। अतः तत्+सेवित+क्षेत्रे लोकाः सादरं याति'।११। 'एहि, अद्य योग+गत्या अद्रिं गत्वा तत् ते दर्शयामि,' इति उक्त्वा दिव्ये पादुका धारयित्वा, दृशौ दृढं..।१२। निमीलयित्वा तेन सह क्षणात् श्रीशैलं ययौ। 'अमुं श्रीशैलं, दृशौ उन्मील्य पश्य,' इति अजः प्राह।१३।

त्यामुळे तिथे पूजा-पाठ-जप आदि उपासना करणाऱ्यांची कार्यसिद्धी लवकर होते. महातपस्वी हे स्वतः तर मुक्त असतातच पण इतरांनाही..(९) आपल्या तपाच्या सामर्थ्याने मुक्त करतात. लोकांच्या उद्धारासाठीच ह्या थोर तपस्वी विभूती जन्माला येतात.१०. (*जगाच्या कल्याणा संताच्या विभूती।* संत तुकाराम)' 'त्यांच्या संचाराने पावन झालेल्या भूमीची धूळ जरी लागली तर माणूस मुक्त होतो. म्हणून त्यांच्या वासाने पवित्र झाालेल्या क्षेत्रांना लोक आदरपूर्वक जातात.(११) चल, आज योगगतीने मी तुला नेऊन श्रीशैल्याचे दर्शन घडवितो.' असे म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपल्या दिव्य पादुका धरून डोळे घट्ट मिटायला सांगितले. क्षणार्धात श्रीशैल्याला येऊन म्हणाले, 'डोळे उघडून पाहा हा श्रीशैल्य पर्वत!'१३.

**सोऽप्युन्मीलितदृग्दृष्ट्वा श्रीगिरिं तदनुज्ञया । क्षौरस्नानादि कृत्वागाद् द्रष्टुं श्रीमल्लिकार्जुनम् ।।१४।।**
**यान्तं स्वकः प्रेक्ष्य तमाह नोऽनु-यातोऽसि कस्मान्न युतिं करोषि ।**
**अद्य क्षणाच्छ्रीगुरुणाऽऽहृतोऽस्मी-त्युक्तोऽपि तेनोक्तममंस्त मिथ्या ।।१५।।**
**तस्मै यथास्वं स निवेद्य भक्तो । गुर्वङ्घ्रिपद्मद्वय एकतानः ।**
**प्रासादमेत्यान्तरनेकलोक-व्याप्तं विवेशेश्वरदर्शनाय ।।१६।।**
**तत्रोपविष्टं गुरुमर्चयन्ति । सर्वेऽपि कश्चिन्न हि तत्र देवः ।**
**इत्थं विलोक्यापि गुरुं प्रपूज्य । पुनर्गुरुं प्राप्य तदुक्तवान्सः ।।१७।।**

सः अपि उन्मीलित+दृक् श्रीगिरिं दृष्ट्वा तत् अनुज्ञया क्षौर+स्नान+आदि कृत्वा श्रीमल्लिकार्जुनं द्रष्टुं अगात्।१४। स्वकः यान्तं प्रेक्ष्य तं आह, 'नः अनुयातः असि! कस्मात् युतिं न करोषि?' तेन उक्तम् 'अद्य क्षणात् गुरुणा आहृतः अस्मि', मिथ्या ममंस्त।१५। सः भक्तः तस्मै यथास्वं निवेद्य गुरु+अङ्घ्रि+पद्म+द्वय एकतानः अनेक+लोक+व्याप्तं प्रासादं एत्य ईश्वर+दर्शनाय अन्तः विवेश।१६। तत्र सर्वे अपि उपविष्टं गुरुं अर्चयन्ति। तत्र कश्चित् देवः न हि। इत्थं विलोक्य अपि गुरुं प्रपूज्य पुनः गुरुं प्राप्य सः तत् उक्तवान्।१७।

तंतुकाने डोळे उघडून श्रीगिरीचे दर्शन घेतले. मग त्याने श्रीगुरूंच्या आज्ञेने क्षौर, स्नान इत्यादि करून तो श्रीमल्लिकार्जुनाच्या दर्शनासाठी निघाला.१४. त्याला देवळात जाताना त्याच्या आप्ताने पाहिले. तो म्हणाला, 'आमच्या मागे मागे आलास तर मग वाटेत आम्हाला का भेटला नाहीस?' त्याने आपल्याला श्रीगुरूंनी आत्ता एका क्षणापूर्वी आणल्याचे सांगितले. त्याचा त्याच्यावर विश्वास न बसल्याने तो खोटे सांगतो असेच त्याला वाटले.१५. त्या आप्ताचे यथायोग्य समाधान करून तो श्रीगुरुचरणांच्या पायांच्या चिंतनात एकाग्रचित्त होऊन, दर्शनोत्सुक लोकांनी गजबजलेल्या त्या मंदिरांत आला आणि ईश्वरदर्शनासाठी त्याने अंतर्गृहात प्रवेश केला.१६. त्याने पाहिले तर तिथे कोणताच देव नसून श्रीगुरूच बसलेले आहेत. सर्व लोक त्यांचीच पूजा करीत आहेत. त्यानेही श्रीगुरूंची पूजा केली आणि पुन्हा श्रीगुरूंपाशी येऊन म्हणाला.१७.

**अत्र त्वमेवासि कुतोऽज्ञलोका । आयान्ति हित्वा निकटस्थितं त्वाम् ।**
**व्याप्याखिलं त्वं परिपूर्णविश्वं । दशाङ्गुलं तिष्ठसि वक्ति वेदः ।।१८।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**एकः परात्मा भजतां तथापि । स्थानप्रभावः प्रिय भिन्न एव ।**
**स्थानं त्विदं सर्वजनाश्रयं सन् । मुक्तिप्रदं शृण्विह पूर्ववृत्तम् ।।१९।।**
**विमर्षणो नाम नृपः किरात-देशे कृती क्षात्रवृषप्रवीणः ।**
**द्विजातिभक्तोऽपि च भूतमात्र-हिते रतः साधुजनानुयायी ।।२०।।**

'त्वं एव अत्र असि! अज्ञ लोकाः निकट+स्थितं त्वां हित्वा कुतः आयान्ति? (हे) परिपूर्ण, वेदः वक्ति, त्वं अखिलं विश्वं व्याप्य दश+अङ्गुलं तिष्ठसि।'१८। श्रीगुरुः उवाच। (हे) प्रिय, पर+आत्मा एकः। तथापि भजतां स्थान+प्रभावः भिन्न एव। इदं तु सर्व+जन+आश्रयं मुक्ति+प्रदं सन् स्थानम्। इह पूर्ववृत्तं शृणु।१९। किरात+देशे विमर्षणः नाम क्षात्र+वृष+प्रवीणः कृती नृपः द्विजाति+भक्तः अपि च भूत+मात्र+हिते रतः साधु+जन+अनुयायी।२०।

'इथे मंदिरातही आपणच आहात! हे वेडे लोक निकटच असलेल्या तुम्हाला सोडून इतक्या दूर का बरे येतात? परिपूर्ण सद्गुरो, वेदांत सांगितल्याप्रमाणे आपण सर्व विश्व व्यापून दहा अंगुळे उरलेला आहात.' अधिष्ठानत्वाने विवर्ताहून अधिक आहात असा भावार्थ.१८. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'प्रिय भक्ता, परमात्मा एकच आहे. तरीही उपासकांसाठी त्या त्या स्थानांचा प्रभावही वेगवेगळा असतो. हे श्रीशैल्य सर्व लोकांना आश्रयभूत आणि मुक्तिप्रद स्थान आहे. तुला एक प्राचीन कथा सांगतो, ऐक.' १९. किरात देशी एक विमर्षण नावाचा राजा होता. तो क्षात्रधर्मात कुशल, कर्तृत्ववान्, सर्व जीवांचे हित जपणारा, देवद्विजांचा भक्त आणि साधूंचे अनुसरण करणारा होता.२०.

**स्त्रीलम्पटः प्राग्गुणतो निषिद्धभुक् । शैवोत्तमः शङ्कररूपचिन्तकः ।**
**तं प्राह साध्वी महिषी कथं शिवे । भक्तिर्दृढा धर्मविरुद्धचेष्ट ते ॥२१॥**

**॥ राजोवाच ॥**

**पम्पापुरे श्वाभवमाद्यजन्यामुच्छिष्टमत्तुं शिवसद्म यातम् ।**
**हन्युर्जना द्वारि मृतिक्षणेऽजो । दृष्टोऽर्चितः प्रोज्वलिताश्च दीपाः ॥२२॥**
**प्रदक्षिणं तं हि परीत्य शैवे । दिने मृतस्तेन नृपोऽत्र शैवः ।**
**ये दुर्गुणास्ते श्वनिसर्गजोत्थाः । स्युः पूर्वसंस्कृत्यनुगो हि जीवः ॥२३॥**

शैव+उत्तमः शङ्कर+रूप+चिन्तकः (अपि) प्राक्+गुणतः स्त्री+लम्पटः निषिद्ध+भुक् (आस)। साध्वी महिषी तं प्राह, '(हे) धर्म+विरुद्ध+चेष्ट, ते शिवे दृढा भक्तिः कथम्?'२१। राजा उवाच। आद्य+जन्यां पम्पापुरे श्वा अभवम्। उच्छिष्टं अत्तुं शिव+सद्म यातं जनाः द्वारि हन्युः। मृति+क्षणे अर्चितः अजः, तं प्रदक्षिणं परीत्य हि, दृष्टः, प्रोज्वलिताः दीपाः च।२२। शैवे दिने मृतः तेन अत्र शैवः नृपः। ये दुर्गुणाः श्व+निसर्ग+ज+उत्थाः। जीवः पूर्व+संस्कृति+अनुगः स्युः।२३।

तो भगवान् शंकरांच्या रूपाचे सतत चिन्तन करणारा परम शिवभक्त असूनही पूर्वसंस्कारांमुळे स्त्रैण वृत्तीचा होता. तसेच त्याला अभक्ष्य भक्षणाचीही आवड होती. एकदा त्याच्या साध्वी पत्नीने - अभिषिक्त राणीने, त्याला विचारले, 'अहो, तुमचे आचरण असे धर्माविरुद्ध असूनही तुमची शंकरांच्या ठायी एवढी दृढ भक्ती कशी आहे?'२१. राजा उत्तरला, 'पूर्वजन्मी पंपापुरीत कुत्रा होतो. एकदा उष्टे-खरकटे कांही खायला मिळाले तर पाहावे म्हणून मी शंकराच्या देवळात जात असताना लोकांनी मला दारात मारून टाकले. मरताना माझी देवाला प्रदक्षिणा झाली, पूजा केलेल्या देवाचे दर्शन झाले आणि दारासमोर उजळलेले दीप दिसले.२२. तो दिवस सोमवार होता. त्या पुण्याईने मी हा शिवभक्त राजाचा जन्म पावलो आहे. माझे जे दुर्गुण आहेत श्वानस्वभावांतून आले आहेत.' भगवद्गीतेच्या वचनानुसार भौतिक शरीर आणि इंद्रिये यांच्या कर्तृत्वाला स्वभावच कारण असतो (*कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते॥* १३:२०). विद्वान् किंवा

**प्राङ्मे जनिः क्वेति तयाह पृष्टः । प्राक्त्वां कपोतीं सति चञ्चुमांसाम् ।**
**चिल्लोऽहनच्छ्रीमदगे शिवाग्रे । प्राणार्पणान्मे महिषीह जाता ।।२४।।**
**क्वेतो भवान् यास्यसि चाप्यहं क्व । शंसेति पृष्टः स तु सिन्धुदेशे ।**
**राजा भविष्याम्यपि सृञ्जयोत्था । मत्स्त्री त्वमग्रेऽपि कलिङ्गजा त्वम् ।।२५।।**
**सौराष्ट्रकेऽहं खलु मागधी त्वं । गान्धारजावन्तिदशार्णजौ च ।**
**नृपोऽप्यनन्तोऽपि ययातिजा त्वं । पाण्ड्योऽहमग्रेऽपि विदर्भजा त्वम् ।।२६।।**

तया 'प्राक् मे जनिः क्व?' इति पृष्टः आह। '(हे) सति, प्राक् त्वां चञ्चु+मांसां कपोतीं चिल्लः श्रीमत्+अगे अहनत्। शिव+अग्रे प्राण+अर्पणात् इह मे महिषी जाता।'२४। 'इतः भवान् क्व यास्यसि? अहं च अपि क्व? शंस' इति पृष्टः सः तु, 'सिन्धुदेशे राजा भविष्यामि। त्वं सृंजय+उत्था मत्+स्त्रीः। अग्रे अपि त्वं कलिङ्ग+जा,'।२५। 'अहं सौराष्ट्रके। त्वं मागधी (अहं) गांधारजः। अवन्तिदशार्णजौ च। अनन्तः नृपः त्वं ययाति+जा। अग्रे अहं पाण्ड्यः त्वं अपि विदर्भजा।२६।

भक्तही असला तरी तो आपल्या स्वभावानुसारच रहाटतो (*सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।* भ.गीता ३:३३)२३. तेव्हा राणीने आणखी विचारले, 'माझा पूर्वजन्म कुठे झाला?' राजाने सांगितले, 'तू मागच्या जन्मात कपोती होतीस.तू एकदा चोचीत मांसाचा घास घेऊन उडत असता श्रीशैल्यावर एका घारीने तुला त्या मांसासाठी मारून टाकले. शंकरासमोर प्राण अर्पण केल्याने तू इथे माझी पट्टराणी झालीस.'२४. 'आता यापुढच्या जन्मात तुमची माझी गती काय असेल? मला सांगा,' असे राणीने विचारल्यावर राजा सांगू लागला. 'मी पुढील जन्मात सिंधुदेशाचा राजा होणार आहे आणि तुझा जन्म सृंजय देशाच्या राजाच्या पोटी होईल आणि पुन्हा तुझे माझ्याशीच लग्न होईल. त्यापुढच्या जन्मांत तू कलिंग देशाची राजकुमारी होशील.'२५. 'आणि मी सौराष्ट्रांत राजा होईन. चौथ्या जन्मात तू मगध देशाची राजकुमारी होशील गांधार देशात जन्मलेल्या माझ्याशी विवाह करशील. पाचव्या जन्मात अवन्ती आणि दशार्ण देशात जन्म घेऊन आपण लग्न करू. सहाव्या जन्मात मी अनन्तः नावाचा राजा होईन आणि तू ययातीची कन्या होऊन माझी पट्टराणी होशील. सातव्या जन्मात मी पांड्य देशाचा राजा आणि तू विदर्भाची राजकुमारी होशील.२६.

**स्मरोपमो धीगुणशीलशाल्यहं । वृत्वा तदा त्वां रतिभां स्वयंवरे ।**
**त्वया सहेष्ट्वा पुरुदक्षिणान्मखान् । सम्राट्तया प्राप्य सुतान्सुभोगयुक् ।।२७।।**
**लब्ध्वात्मतत्त्वं घटजाच्च जीवन्-मुक्तो भविष्यामि सह त्वयैवम् ।**
**राड्दम्पती वै प्रतिजन्म भूत्वा । मुक्तौ भविष्याव इति ह्यवोचत् ।।२८।।**
**शम्भोः पुरः साहजिकासुदानादेवं तिरश्चोऽपि गतिस्तु लोकाः ।**
**बुद्ध्वेदमायान्त्यपि देवता तु । स्थलानुमानात् खलु जागरूका ।।२९।।**
**इत्युक्त्वा धारयित्वेशः पादुके सङ्गमं क्षणात् । तमानीयेरयद् ग्रामं प्रहृष्टः प्रययौ स तु ।।३०।।**

स्मर+उपमः धी+गुण+शील+शाली अहं रति+भां त्वां स्वयंवरे वृत्वा, त्वया सह पुरु+दक्षिणान् मखान् इष्ट्वा सम्राट्तया सुतान् प्राप्य सुभोग+युक्।२७। घटजात् आत्मतत्त्वं लब्ध्वा जीवन्मुक्तः भविष्यामि। एवं त्वया सह प्रतिजन्म वै राट्+दम्पती भूत्वा मुक्तौ भविष्याव।' इति हि अवोचत्।२८। 'शम्भोः पुरः साहजिक असु+दानात् तिरश्च अपि एवं गतिः। लोकाः तु इदं बुद्ध्वा आयान्ति। देवता तु स्थल+अनुमानात् जागरूका खलु'।२९। इति उक्त्वा ईशः तं पादुके धारयित्वा क्षणात् सङ्गमं आनीयेरयत्। सः तु प्रहृष्टः ग्रामं ययौ।३०।

मी मदनासारखा सुंदर, बुद्धिमान, गुणवान् सुशील असेन आणि रतीसम रूपवान अशा तुझ्याशी स्वयंवरात लग्न करीन. तुझ्यासह मी सम्राट होऊन अनेक मोठमोठे यज्ञ करीन. अमरकोशानुसार (२:७:३), 'जो राजसूय यज्ञ करतो, राजमंडलाचा अधिपती असतो आणि ज्याच्या आज्ञेने राजे लोक शासन करतात तो सम्राट.' आपण सर्व ऐहिक सुखांचा भोग घेऊ. आपल्याला अनेक पुत्र होतील.२७ उतारवयात मी अगस्ती महर्षींकडून आत्मज्ञान प्राप्त करीन जीवन्मुक्त होईन. अशा रीतीने तुझ्यासह प्रत्येक जन्मात राजाराणी होऊन आपण मुक्त होऊ.'२९. तंतुकाला श्रीगुरू सांगतात, 'शिवमंदिरासमोर नैसर्गिक प्राणदानानेसुद्धा पशु-पक्ष्यांना अशी गती लाभते. (मग संकल्पपुरःसर जपतपादि करणाऱ्या मनुष्यांचे फळ किती असेल?) हे जाणून लोक श्रीशैल्याला येतात. तात्पर्य देवता स्थानाच्या प्रभावानुसार जागरूक असतात.'२९. इतके बोलून श्रीगुरूंनी तंतुकाला पुन्हा पादुका धरायला लावून क्षणभरात संगमावर आणले. तो हर्षोत्फुल्ल चित्ताने गाणगापूराला गेला.३०.

**तत्रत्याः सङ्गमेऽदृष्ट्वा गुरुं खिन्ना अवेक्ष्य तम् । आयान्तमब्रुवन्यान्तः कस्मात् क्षौरं कृतं त्वया ॥३१॥**
**स प्राह मां क्षणान्नीत्वा श्रीशैलं भो यथाविधि । क्षेत्राचारं कारयित्वा सम्प्रत्यत्रानयत्प्रभुः ॥३२॥**
**तच्छ्रुत्वात्रैष मध्याह्ने दृष्टो ब्रूते मृषेति ते । मत्वैत्य सङ्गमे तत्र निशि सर्व उपोषिताः ॥३३॥**
**चक्रुर्जागरणं शैव-नामोच्चारणपूर्वकम् । ततः शैलाज्जनः प्राप्तः पक्षात्स प्राह विस्मितः ॥३४॥**
**श्रीशैलेऽयं शिवद्वारि तन्तुकः सकृदीक्षितः । तदा सप्रत्ययाः सर्वे ननन्दुर्विस्मिता भृशम् ॥३५॥**

तत्रत्याः गुरुं सङ्गमे अदृष्ट्वा खिन्ना यान्तः तं आयान्तं अवेक्ष्य अब्रुवन् 'त्वया कस्मात् क्षौरं कृतम्?'।३१। सः प्राह, 'भो, प्रभुः मां क्षणात् श्रीशैलं नीत्वा, यथाविधि क्षेत्र+आचारं कारयित्वा सम्प्रति अत्र आनयत्'।३२। तत् श्रुत्वा ते 'एष मध्य+अह्ने दृष्टः, मृषा ब्रूते' इति मत्वा सङ्गमे एत्य तत्र निशि सर्व उपोषिताः।३३। शैव+नाम+उच्चारण+पूर्वकं जागरणं चक्रुः। ततः पक्षात् शैलात् जनः प्राप्तः। सः विस्मितः प्राह।३४। 'अयं तन्तुकः श्रीशैले शिव+द्वारि सकृत् ईक्षितः। तदा सर्वे स+प्रत्ययाः भृशं विस्मिताः ननन्दुः।३५।'

तंतुक त्वरेने गावाकडे जात असता, श्रीगुरू संगमावर नसल्याने खिन्न होऊन गावाकडे परतणारे तेथील लोक त्याला भेटले. त्यांनी त्याला येताना पाहून विचारले, 'अरे, तू हे क्षौर कशासाठी केलेस?'३१. तो म्हणाला, 'अहो, श्रीगुरुमहाराजांनी मला आज क्षणार्धात श्रैशैल्याला नेले. माझ्याकडून यथाविधी सर्व क्षेत्राचार करविला; आणि आत्ताच थोड्या वेळापूर्वी मला परत आणले!'३२. ते ऐकून त्या लोकांनी विचार केला की 'आत्तां दुपारीच तर याला इथे पाहिला. थापा मारतोय.' मग ते सर्व संगमावर आले. शिवरात्रीचा उपास करून रात्री(३३) शिवनामाच्या भजनाच्या गजरांत जागरण केले. पंधरा दिवसांनी तंतुकाचे भाऊबंद श्रीशैल्याहून परतले. त्यांनी सांगितले, 'हा तंतुक श्रीशैल्याला मंदिरासमोर एकदा पाहिला होता खरा!' तेव्हा सर्वांना श्रीगुरूंच्या सामर्थ्याचा प्रत्यय येऊन नवल वाटले आणि आनंदही झाला.३५.

**सद्गुरोः सेवया बाढं कर्मबन्धं निहत्य सः । सिषेवे परमानन्दं यत्र नो द्वन्द्वसाध्वसम् ।।३६।।**
**एकैकयापि भक्त्यैवं मुक्ताः कति न वेद तान् । कवी शिष्यावभूतां तौ मुक्तौ श्रीगुरुकीर्तनात् ।।३७।।**
**गुरुलीलामयास्ताभ्यां प्रभूता ग्रथिताः कथाः । तल्लीला वक्ति कः कात्स्न्र्याद्यत्र वेदोऽपि शङ्कितः ।।३८।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**कौ शिष्यौ सद्गुरोर्जातौ तन्मे कथय सादरम् । वक्ता हि श्रोतृपृच्छाशीः स्मृतिमेति यतः कथा ।।३९।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**नन्दिशर्मा द्विजः कश्चित् कुष्ठार्तः तुलजापुरि । त्र्यब्दं तेपे तपः स्वप्ने देव्योक्तं गच्छ चेश्वरीम् ।।४०।।**

सद्गुरोः सेवया कर्म+बन्धं बाढं निहत्य परम+आनन्दं सिषेवे यत्र द्वन्द्व+साध्वसं नो।३६। एवं एक+एकया अपि भक्त्या कति मुक्ताः तान् न वेद। कवी शिष्यौ अभूतां तौ श्रीगुरु+कीर्तनात् मुक्तौ।३७। ताभ्यां ग्रथितां गुरु+लीला+मयाः कथाः प्रभूताः। यत्र वेदः अपि शङ्कितः तत् लीलाः कः कात्स्न्र्यात् वक्ति?३८। नामधारक उवाच। 'सद्गुरोः कौ शिष्यौ जातौ तत् सादरं मे कथय। वक्ता हि श्रोतृ+पृच्छ+आशीः यतः कथा स्मृतिं एति।'३९। सिद्ध उवाच। 'कश्चित् नन्दिशर्मा कुष्ठ+आर्तः द्विजः तुलजा+पुरि त्रि+अब्दं तपं तेपे। देव्या स्वप्ने उक्तं च 'ईश्वरीं गच्छ'।४०।

त्या तंतुकाने पुढे सद्गुरूंची सेवा करून आपले कर्मबंधन पूर्णपणे तोडून टाकले. द्वैताचे भय मागे टाकून निरतिशय परमानंदात निमग्न झाला.३६. अशा रीतीने नऊ भक्तींपैकी एका एका भक्तीनेही किती मुक्त झाले याची गणती नाही. दोन कवी श्रीगुरूंचे शिष्य झाले. श्रीगुरूंच्या लीला गाऊन कीर्तनभक्तीने ते मुक्त झाले.३७. अर्थात् ज्याचे गुण गाता गाता वेदही अचंबित झाले त्याच्या लीला पूर्णतया कोण सांगू शकेल?३८. नामधारक म्हणाला, 'महाराज, श्रीगुरूंच्या लीला गाणारे ते कोण शिष्यद्वय झाले ते ऐकण्यास मी सादर आहे. आपणच (३ऱ्या अध्यायांत) म्हणाल्याप्रमाणे वक्त्यालासुद्धा कथा आठवण्यासाठी प्रश्नाची अपेक्षा असते.'३९. सिद्धांनी सांगायला सुरुवात केली, 'एका नन्दी नावाच्या ब्राह्मणाला कुष्ठ झाले. त्याच्या परिहारासाठी त्याने तुळजापूरला देवीपुढे तीन वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा त्याला देवीने स्वप्नांत चंदला परमेश्वरीकडे जायला सांगितले.'४०.

**स चन्दलेश्वरीं प्राप्य सप्तमासं तपोऽतपत् । तयाप्युक्तं यतिं गच्छ स्थितं भीमामरायुतौ ।।४१।।**
**स प्राह तां गच्छ मर्त्यमिति वक्तुं न लज्जसे । परीक्षितं त ऐश्वर्यमियत्कष्टं कुतोऽर्पितम् ।।४२।।**
**इत्युक्त्वा स तपस्तेपे भक्तैर्देव्या स हापितः । यद्भव्यं तद्भवत्वेव कष्टमेतावदर्जितम् ।।४३।।**
**देव्याज्ञया तथैवाल्पं सह भोग्यमिति द्विजः । मत्वा स्वगतमानम्य देवीं भुक्तो ययौ यतिम् ।।४४।।**
**गन्धर्वपुरमासाद्य स यतिः क्वेत्यपृच्छत । पापं मत्वार्जुनाभं तं कुष्ठिनं नोत्तरं ददुः ।।४५।।**

सः चन्दल+ईश्वरीं प्राप्य सप्त+मासं तपः अतपत्। तया अपि उक्तं, 'भीमा+अमरा+युतौ स्थितं यतिं गच्छ।'४१। सः तां प्राह। 'मर्त्यं गच्छ इति वक्तुं न लज्जसे (किम्)? ते ऐश्वर्यं परीक्षितम्। इयत् कष्टं कुतः अर्पितम्?'४२। इति उक्त्वा सः तपः तेपे। देव्या भक्तैः सः हापितः। 'यत् भव्यं तत् भवतु एव। एतावत् कष्टं अर्जितम्।४३। देव्या आज्ञया तथा एव अल्पं सह भोग्यम्' इति स्वगतं मत्वा द्विजः देवीं आनम्य भुक्तः यतिं ययौ।४४। गन्धर्वपुरं आसाद्य सः 'यतिः क्व?' इति अपृच्छत। तं अर्जुन+आभं कुष्ठिनं पापं मत्वा उत्तरं न ददुः।४५।

देवीच्या आज्ञेप्रमाणे नन्दीने चंदला परमेश्वरीला जाऊन सात महिने तप केले. ईश्वरीनेही त्याला सांगितले की, 'भीमाअमरजा संगमावर संन्यासी आहेत. त्यांच्याकडे जा.'४१. त्यावर नन्दीने देवीला विचारले, 'मर्त्य मानवाकडे मला पाठवायला तुला लाज वाटत नाही का? बघितलं तुझं देवपण! हेच सांगायचे होते तर इतके कष्ट का दिलेस?'४२. असे बोलून त्याने पुन्हा देवीपुढे तप सुरू केले. तेव्हा देवीच्या भोप्यांनी त्याला देवीच्या आदेशाने देवळाबाहेर हाकलून दिले. मग त्याने विचार केला की 'जे व्हायचे होऊ दे. इतके कष्ट केलेत तर देवीच्या आज्ञेप्रमाणे आणखी एक वेळ प्रयत्न करून पाहू.' देवीला नैवेद्य करून पारणा केली आणि गाणगापुरास गेला.४४. तिथे जाऊन त्याने चौकशी केली की 'इथे संन्यासी कुठे आहेत?' पण त्याचे कुष्ठामुळे सर्वांग अर्जुन वृक्षासारखे पांढरे झालेले पाहून अशुभशंकेने कुणी त्याच्याशी बोलेना.४५.

**तं कश्चिदाह स्नात्वारं शिवरात्रिव्रतस्य च । पारणायै मठे देव आयास्यत्यत्र तिष्ठ भोः ।।४६।।**
**अत्रान्तरे प्रभुः प्राप मठं भक्तास्तमब्रुवन् । द्विजोऽर्जुनश्वेतदेह इदानीं कश्चिदागतः ।।४७।।**
**विश्वसाक्षी तमाहूय प्राह हित्वामरान्नरम् । आयातोऽसि कुतोऽर्हः किं दोषोत्थस्थास्नुरुग्हृतौ ।।४८।।**
**तच्छ्रुत्वा मत्कृतं ज्ञातमनेनैष न मानुषः । प्रत्यक्षः परमात्मेति मत्वोचे तं क्षमाप्य सः ।।४९।।**
**मूढोऽहं कुत्सितमतिः पापात्मा पापसम्भवः । शरण्यं त्वां प्रपन्नोऽस्मि दयाब्धिं भक्तवत्सलम् ।।५०।।**

कश्चित् तं आह, 'देव स्नात्वा शिवरात्रि+व्रतस्य पारणायै मठे आयास्यति। भोः अत्र तिष्ठ'।४६। अत्र+अन्तरे प्रभुः मठं प्राप। भक्ताः तं अब्रुवन्। 'इदानीं कश्चित् अर्जुन+श्वेत+देह द्विजः आगतः।'४७। विश्व+साक्षी तं आहूय प्राह, 'अमरान् हित्वा नरं कुतः आयातः असि? दोष+उत्थ+स्थास्नु+रुक्+हृतौ (नरः) अर्हः किम्?'४८। तत् श्रुत्वा, 'अनेन मत्+कृतं ज्ञातम्। एष न मानुषः, प्रत्यक्षः परमात्मा।' इति मत्वा सः तं क्षमाप्य।४९। 'अहं मूढः कुत्सित+मतिः पाप+आत्मा पाप+संभवः त्वां शरण्यं दया+अब्धिं भक्त+वत्सलं प्रपन्नः अस्मि।'५०।

कुणी तरी त्याला म्हणाले, 'गुरुदेव स्नानादि उरकून शिवरात्रीच्या पारण्यासाठी मठात येतील. तुम्ही इथेच थांबा.'४६. एवढ्यात प्रभू मठाला आलेच. भक्तांनी त्यांना सांगितले, 'आत्ता इथे एक अर्जुनाच्या झाडाप्रमाणे पांढरा शुभ्र ब्राह्मण आलेला आहे.' विश्वसाक्षी श्रीगुरूंनी त्याला बोलावून विचारले. 'देवाला सोडून माणसाकडे कसे आलात? दीर्घकाल स्थिरावलेल्या रोगाचा परिहार मर्त्य मानव करण्याला समर्थ असेल का?'४८. ते ऐकून नंदी चमकला. 'यांनी माझा इतिहास आणि माझे मन ओळखले. हे सामान्य मानव नाही. हे तर साक्षात् परमात्मा आहेत!' असा विचार करून त्याने त्यांची क्षमा मागितली.४९. तो म्हणाला, 'मी मूर्ख आहे, कुबुद्धी आहे, पापी आहे आणि पापापासूनच उपजलेला आहे. दयासागरा, भक्तवत्सला, आपणच योग्य आश्रय आहात असे जाणून मी आपल्याला शरण आलो आहे.'५०.

**मयि कुष्ठं समुत्पन्नं विवाहोर्ध्वं तदैव तु । पितृदारैरपि परि-त्यक्तं मां कोऽपि नेक्षते ।।५१।।**
**नाङ्गीकुर्वन्त्यपि सुरा भात्यतोऽपि मृतिर्वरम् । परात्मना त्वया नोचेत्स्वीकृतोऽत्र जहाम्यसून् ।।५२।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**मा भीः पापोत्थरोगोऽयमियत्कालमनेन तु । भुक्तं पापमतो भक्तिर्मयि जाताचलामला ।।५३।।**
**अत्रास्ते सङ्गमे तीर्थ-राजोऽघौघविनाशनः । तत्र स्नाहीति संभाष्य सोमनाथमथाब्रवीत् ।।५४।।**
**विधिवत्कारयित्वा षट्-कूलतीर्थे सचैलकम् । अश्वत्थमर्चयित्वा द्राक् सोमनाथामुमानय ।।५५।।**

'विवाह+ऊर्ध्वं मयि कुष्ठं समुत्पन्नम्। तदा एव तु पितृ+दारैः अपि मां परित्यक्तम्। मां कः अपि न ईक्षते।'५१। 'सुराः अपि न अङ्गीकुर्वन्ति। अतः मृतिः अपि वरं भाति। त्वया पर+आत्मना नो स्वीकृतः चेत् अत्र असून् जहामि'।५२। श्रीगुरुः उवाच। 'मा भीः। अयं पाप+उत्थ+रोगः। इयत् कालं अनेन पापं भुक्तम्। अतः मयि अचला अमला भक्तिः जाता।५३। अत्र सङ्गमे अघ+ओघ+विनाशनः तीर्थ+राजः आस्ते। तत्र स्नाहि।' इति संभाष्य अथ सोमनाथं अब्रवीत्।५४। 'सोमनाथ, अमुं षट्कूलतीर्थे विधिवत् सचैलं (स्नानं) कारयित्वा, अश्वत्थं अर्चयित्वा द्राक् आनय।'५५।

नन्दी सांगू लागला, 'लग्नाच्या नंतरच मला हे कोड फुटले. त्याच वेळी माझे आईवडील आणि पत्नीनेही माझा त्याग केला. माझ्याकडे कुणी पाहातसुद्धा नाहीत'५१. 'माणसांचे सोडा, देवही मला उबगतात. ह्यापेक्षा मरण बरे असे वाटते. हे परमात्मा, आपण जर माझा अङ्गीकार केला नाही तर मी आता इथेच (प्रायोपवेशनाने) प्राणत्याग करीन.'५२. श्रीगुरू त्याला धीर देत म्हणाले, 'हा (पूर्वजन्मकृत) पापांतून उद्भवलेला रोग आहे. आता इतक्या दिवसात ते पाप भोगून झाले आहे. म्हणूनच तुला माझ्या ठिकाणी दृढ आणि शुद्ध भक्ती उपजली आहे.५३. 'इथे संगमावर पापांच्या राशींचा नाश करणारा तीर्थराज आहे. तिथे स्नान कर.' असे त्याला समजावून श्रीगुरू सोमनाथाला (गंगेचा पती) म्हणाले.५४. 'सोमनाथ, ह्याला संगमावर नेऊन षट्कूलांत विधिपूर्वक वस्त्रासहित स्नान करवा. तसेच अश्वत्थाची पूजाही याच्याकडून करून घ्या आणि इथे आणा.'५५.

**सोऽप्युक्तवत् कारयित्वा तमानीय गुरोः पदे । उपानयत्तमाहेशः पश्योत्तिष्ठाखिलं वपुः ।।५६।।**
**स्वर्णीभूतं स तु स्वाङ्गमुत्थायोद्वीक्ष्य विस्मितः । किञ्चित्कुष्ठाङ्किताष्ठीवद् गुरुं प्राञ्जलिरब्रवीत् ।।५७।।**
**भगवन्किं कृतं त्वेतत् कुष्ठं शिष्टं कुतोऽल्पकम् । तच्छ्रुत्वा सस्मितं प्राह त्वत्संशयफलं त्विदम् ।।५८।।**
**इत्याश्राव्य गुरोर्वाक्यं प्रणिपत्याब्रवीद्वचः । सुधाप्यम्बुधिया पीता मृतिं नयति किं दवः ।।५९।।**
**स्प्रष्टाऽवित्वाद्दहत्यल्पं स्वभावं परिहृत्य किम् । हरे स्वभावः पूर्णत्वं तवानेनैति किं वद ।।६०।।**

सः अपि उक्त+वत् कारयित्वा तं आनीय गुरोः पदे उपानयत्। तं ईशः आह, 'उत्तिष्ठ अखिलं वपुः पश्य।'५६। सः तु उत्थाय स्वर्णीभूतं स्वाङ्गं किञ्चित्+कुष्ठ+अङ्कित अष्ठी+वत् उद्वीक्ष्य विस्मितः प्राञ्जलिः गुरुं अब्रवीत्।५७। 'भगवन्, एतत् तु किं कृतम्? अल्पकं कुष्ठं कुतः शिष्टम्?' तत् श्रुत्वा सस्मितं (श्रीगुरुः) प्राह 'इदं त्वत्+संशय+फलम्।'५८। इति गुरोः वाक्यं श्रुत्वा प्रणिपत्य वचः अब्रवीत्। 'सुधा अम्बु+धिया पीता अपि मृतिं नयति किम्? दवः।५९। अवित्वात् स्प्रष्टा स्वभावं परिहृत्य अल्पं दहति किम्? हरे, तव स्वभावः अनेन पूर्णत्वं एति किम्? वद।'६०।

सोमनाथाने श्रीगुरूंच्या आदेशानुसार सर्व करून नन्दीला आणले आणि श्रीगुरूंसमोर उभे केले. त्याने साष्टांग नमस्कार केला. त्याला प्रभू म्हणाले, 'ऊठ, तुझे सर्व अंग नीट न्याहाळून पाहा.'५६. त्याने उठून आपले सर्व अंग निरोगी आणि सुवर्ण झालेले पाहिले; पण गुडघ्यावर किंचित् कोड राहिलेले दिसले.५७. तेव्हा तो काकुळतीने म्हणाला, 'भगवंता, हे आपण काय बरे केलेत? हे थोडेसेच कुष्ठ का शिल्लक ठेवलेत?' सद्गुरूंनी किंचित् स्मित केले आणि म्हणाले, 'अरे, हे तुझ्या संशयाचे फळ आहे!'५८. हे श्रीगुरूंचे वचन ऐकून नन्दी म्हणाला, 'हे पाणी आहे अशा समजुतीने अमृत प्याल्याने ते मृत्यूला कारण होईल का?'५९. 'अग्नीला अजाणता स्पर्श केला तर ते थोडे कमी भाजेल का? हे हरे, हा दोष अवशिष्ट राहिल्याने आपल्या स्वभावाला परिपूर्णता येईल का?' इथे **'हरे'** हे संबोधन हेतुपुरःसर आहे. पापाचे निर्मूलन करणारा तो हरी. हरीच्या नामात पापाचे निर्हरण करण्याची जितकी शक्ती आहे तेवढे पाप करण्याचे सामर्थ्य कुणाही पातक्याचे नाही (*नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः। तावत्कर्तुं समर्थो न पातकं पातकी नरः।।* स्कंद पुराण, वैष्णव खंड, मार्गशीर्षमाहात्म्य १५:५३)६०.

### ।। श्रीगुरुरुवाच ।।

**यद्भावो यादृशः क्वापि नान्यथा स्यात्स्वदोषतः । ग्रहीतुर्भात्यन्यथार्के जन्मान्धस्येव शून्यता ।।६१।।**
**मर्त्येन मम किं भूयादिति शङ्कोदिता त्वयि । तत्फलं त्विदमस्त्येकः प्रतीकारोऽत्र तं कुरु ।।६२।।**
**श्रुतिबृंहितया सिद्ध्येत् पुरुष्टुत्या त्वमर्त्यता । भविष्यत्यनया शुद्धिस् त्वं कृतार्थो भविष्यसि ।।६३।।**
**तच्छ्रुत्वा दीनवाग्लोलत्सर्वापघन आह तम् । स्वामिन् सर्वान्तरस्थस्त्वं किं वाच्यं तेऽग्रतः प्रभो ।।६४।।**
**लिपिमप्यक्षमो ज्ञातुं कथं स्तौमि पुरुष्टुत । अन्यत्किमपि कर्तुं मां यथास्वं विनियोजय ।।६५।।**

यत्+भावः यादृशः, न क्व अपि अन्यथा स्यात्। ग्रहीतुः स्वदोषतः जन्म+अन्धस्य अर्के शून्यता इव,अन्यथा भाति।६१। 'मर्त्येन मम किं भूयात्?' इति शङ्का त्वयि उदिता। इदं तु तत्+फलं अस्ति। अत्र एकः प्रतीकारः, तं कुरु।६२। श्रुति+बृंहितया पुरु+ष्टुत्या तु अमर्त्यता सिद्ध्येत। अनया शुद्धिः भविष्यति। त्वं कृत+अर्थः भविष्यसि।६३। तत् दीन+वाक् लोलत्+सर्व+अपघन तं आह। '(हे) स्वामिन् त्वं सर्व+अन्तर+स्थः। (हे) प्रभो, ते अग्रतः किं वाच्यम्?'६४। (हे) पुरुष्टुत, लिपिं अपि अक्षमः (अहं) कथं स्तौमि? किं अपि अन्यत् मां यथास्वं कर्तुं विनियोजय।६५।

ज्याचा जसा स्वभाव असतो तो कधीही वेगळा होत नाही. मात्र ग्राहकाच्या दोषामुळे वेगळा भासू शकतो. सूर्य स्वभावतः प्रकाशमान आहे. तो प्रकाशरहित कधीच होणार नाही. जन्मांधाला मात्र तो प्रकाश दिसू शकत नाही. हा त्याचा दोष आहे. न सूर्याचा न प्रकाशाचा.६१. तू इथे येतांना 'हा मर्त्य मानव माझा रोग काय दूर करील?' अशी शंका घेऊन आलास. हे त्याचेच फळ आहे. त्याला एक उपाय मी सांगतो तो कर.६२. उपनिषदांचा अर्थ विशद करणारी प्रगल्भ स्तुती कर. तिच्याद्वारा माझे तसेच तुझेही अमर्त्यत्व (ब्रह्मत्व) सिद्ध होईल. त्यायोगे तुझी शुद्धी होऊन तू कृतार्थ होशील.६३. तेव्हा श्रीगुरूंसमोर तो नंदी सर्वांगांनी लोळण घेत दीनवाण्या वाचेने म्हणाला, 'स्वामी, आपण सर्वांतर्यामी आहात. आपल्याला सांगायचे?'६४. 'आपली थोरामोठ्यांनी प्रगल्भ स्तुती केली आहे. मला धड लिहावाचायलाही येत नाही, मी कशी आपली स्तुती करणार? आपण दुसरे कांही मला झेपेल असे करायला सांगा.'६५.

**प्रभुः प्राह सकृद्वक्त्रान् निर्गतं न पुनर्वचः । ममान्तः प्रविशत्येव दन्तावलरदोपमम् ।।६६।।**
**उक्तमेव त्वया कार्यमित्युक्त्वा भस्म मन्त्रितम् । प्रक्षिप्य तन्मुखे प्राह स्तुहि नानाविधोक्तिभिः ।।६७।।**
**सोऽपि गीष्पतिवद्भूत्वा तं स्तोतुमुपचक्रमे । प्रेमगौरवनम्राङ्गो हर्षगद्गदया गिरा ।।६८।।**

प्रभुः प्राह। सकृत् मम वक्त्रात् निर्गतं वचः, दन्तावल+रद+उपमं, न एव पुनः अन्तः प्रविशति।६६। त्वया उक्तं एव कार्यम्। इति उक्त्वा मन्त्रितं भस्म तत्+मुखे प्रक्षिप्य आह, 'नानाविध उक्तिभिः स्तुहि।'६७। सः अपि गीष्पति+वत् भूत्वा प्रेम+गौरव+नम्र+अङ्गः हर्ष+गद्गदया गिरा स्तोतुं उपचक्रमे।६८।

प्रभू म्हणाले, 'माझ्या मुखातून एकदा बाहेर पडलेले वचन, हत्तीच्या सुळ्यांप्रमाणे, परत आत जात नाही.६६. तुला जे सांगितले आहे तेच करायला पाहिजे.' असे बोलून त्याला जवळ बोलावून श्रीगुरूंनी त्याच्या तोंडात अभिमंत्रण केलेले भस्म टाकले आणि म्हणाले, 'विविध वचनांनी माझी स्तुती कर.'६७. तो नन्दीही जणू बृहस्पतीसारखा वक्ता झाला. प्रेमभराने त्याचे अंग लवले आणि दाटलेल्या कंठाने त्याने स्तवनाला आरंभ केला.६८.

**आत्मा आणि ब्रह्म -** श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणेच तो उपनिषदांचा अर्थ स्पष्ट करणारी स्तुती करीत आहे. 'आपण **साक्षात्** - इंद्रियनिरपेक्ष अंतःस्थित असे **तत्त्व** आहात. मायेचे ईक्षण करणारे जगताचे **कर्ता** आहात. जीवमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार पोषण करणारे **भर्ता** आहात; नित्य तसेच अविनाशी आहात.' नित्य आणि अविनाशी तत्पद आपणच आहात तसेच त्वंपदवाच्य कर्ता आणि भर्ताही आहात. इथे अशी शंका घेतली की सांख्यांच्या प्रतिपादनानुसार, आत्मा असंग आहे. बुद्धीतच सर्व क्रियांचा उगम आहे. मग त्याला कर्ता कसे म्हणता येईल? बुद्धी हे जीवाचे करण (instrument) आहे. झाड तोडताना उपयोगात आणलेल्या कुऱ्हाडीला जसे कर्तत्व येत नाही तसेच बुद्धीलाही येत नाही. ब्रह्मसूत्रांतही (२:३:३३) लौकिक, वैदिक सर्व क्रियांचे कर्तृत्व जीवाचेच आहे. शास्त्रांच्या आज्ञासुद्धा जीवाला उद्देशूनच आहेत.

**साक्षात्तत्त्वमसीश त्वं कर्ता भर्ताव्ययो ध्रुवः । त्वं सर्वं खल्विदं ब्रह्मास्यात्मा साक्षी जगन्मयः ।।६९।।**
**धिया गुणैस्त्रिधाभूतात् स्वभेदात् सत्त्वलक्षणात् । भूतान्युद्भाव्य सर्वात्मन् विश्वं सृष्टं चराचरम् ।।७०।।**
**मायामयं ह्यस्वतन्त्रं वित्पात्रं कल्पितोऽत्र ना । सोऽपि त्वन्मायया भ्रान्तो भूत्वा संकल्पवान्सदा ।।७१।।**

(हे) ईश, त्वं साक्षात् तत्त्वं असि। कर्ता, भर्ता, ध्रुवः, अव्ययः (असि)। त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म आत्मा साक्षी जगत्+मयः असि।६९। धिया सत्त्व+लक्षणात् स्व+भेदात् गुणैः त्रिधाभूतात् भूतानि उद्भाव्य चराचरं विश्वं सृष्टम्।७०। माया+मयं हि अस्वतन्त्रं (विश्वम्)। अत्र वित्+पात्रं ना कल्पितः। सः अपि त्वत् मायया भ्रान्तः सदा सङ्कल्प+वान् भूत्वा,।७१।

'**तत्त्वमसि**' या महावाक्याचा उच्चार केल्यावर त्याच्या विचारासाठी शम आवश्यक आहे. म्हणून **सर्वं खल्विदं ब्रह्म** असा छांदोग्य उपनिषदांतील (३:१४:१) शमवाक्याचा निर्देश केला आहे. *तज्जलान् ज* म्हणजे जनकत्व, *ल* म्हणजे लयत्व आणि *अन्* अनन्यत्व यांच्यामुळे हे सर्व ब्रह्मच आहे. अशा ब्रह्मात रागद्वेषांचा संभवच असू शकत नाही. म्हणून त्याच्या उपासनाकाळात शांत राहावे. शांत राहून कशाचे चिंतन करावे? त्यासाठी सांगतात की व्यापक **आत्मा** चिंतनीय आहे. तो **साक्षी** म्हणचे द्रष्टा - पाहणारा आहे. तो काय पाहतो? तो हे सर्व दृश्य **जगत्** पाहतो, जे त्याच्याच अधिष्ठानावर स्थित आहे. त्याच्या सत्तेवाचून अन्य कोणतीच सत्ता नाही. म्हणून त्याला **जगन्मय** म्हटले आहे.६९.

**विश्वाची सृष्टी -** हे विश्वात्मन्, **धिया** म्हणजे जगताचे उपादान जी माया तिने युक्त अशा महत्तत्त्व नावाची समष्टी बुद्धी, तिच्यापासून सत्त्वप्रधान त्रिगुणांनी त्रिधा झालेल्या अहंकारापासून आकाशादि पंचमहाभूतांची कल्पना (रचना) केली आणि त्यांपासून हे विश्व निर्माण केले.७०.

**संसरण -** ह्या मायामय आणि परतंत्र विश्वात (आत्म)ज्ञानाची क्षमता असलेला मानव निर्माण केला. पण तोसुद्धा तुझ्या मायेला भुलून निरंतर संकल्पाच्या चक्रात सापडून,(७१)

**यात्यधो विस्मृतात्मा सत्-कर्मायत्तो वियोनिषु । भ्रमते भुक्तनिरयः कल्पेऽपि वासनाहृदा ।।७२।।**
**स्थित्वोद्भवति कल्पादौ प्राग्वत्सत्कर्मवानपि । गत्वोर्ध्वं पतति क्षीण-पुण्योऽधश्चन्द्रमण्डले ।।७३।।**
**ततोऽप्योषधिगो भूत्वा पुंसि रेतस्ततोऽप्यसौ । स्त्रीपुंयोगाच्छुक्ररक्त-मयो गर्भत्वमेत्यहो ।।७४।।**
**कललं प्राक् पञ्चरात्राद् बुद्बुदः सप्तरात्रतः । पेशी पक्षादर्बुदोऽथ भवति स्वस्थितो घनः ।।७५।।**

विस्मृत+आत्मा अधः याति। असत्+कर्म+आयत्तः भुक्त+निरयः वियोनिषु भ्रमते। कल्पे अपि वासना+हृदा।७२। स्थित्वा प्राक्+वत् सत्+कर्मवान् अपि ऊर्ध्वं गत्वा क्षीण+पुण्यः अधः चन्द्र+मण्डले पतति।७३। ततः अपि ओषधि+गः पुंसि रेतः ततः अपि असौ स्त्री+पुं+योगात् शुक्र+रक्त+मयः गर्भत्वं एति अहो। प्राक् कललं, पञ्चरात्रतः बुद्बुदः, सप्तरात्रतः पेशी, पक्षात् अर्बुदः स्वस्थितः घनः भवति।७५।

आपल्या स्वरूपाला विसरला. इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी ब्रह्मसूत्राच्या तिसऱ्या अध्यायातील प्रथम पादांत सहा अधिकरणांनी प्रतिपादलेल्या संसाराचे अनुसंधान करायला सांगितले आहे. ह्यात जीवाच्या देहांतरगमनाचे वर्णन आहे. आत्मविस्मृती झालेला हा जीव पापे करून नरक भोगतो आणि नंतर विविध योनीत फिरत राहतो. अंतःकरण वासनांनी व्याप्त असेपर्यंत तो कल्पांतापर्यंत भ्रमण करतो.७२. पुनः पुढच्या कल्पात तो पूर्वीच्याच वासना घेऊन जन्माला येतो. जर त्याच्याकडून पुण्यकर्मे झाली तर ऊर्ध्व गती लाभून तो स्वर्गात जाऊन पुण्यफळांचा भोग घेतो. ती पुण्याई संपली की परत चंद्रमंडलात पडतो.७३. चंद्रलोकापासून परतीचा, पर्जन्य, वनस्पती, पुरुषाचे रेत आणि स्त्रीचे रज हा क्रम वर सांगितला आहे. ह्या क्रमाला पंचाग्निक्रम असे नाव आहे. सूर्याच्या अग्नीत श्रद्धेचा हवि अर्पण करून सोमाची उत्पत्ती होते. वरुणाच्या अग्नीत सोमाचा हवि अर्पण करून पर्जन्याची उत्पत्ती होते. पृथ्वीच्या अग्नीत पर्जन्याचा हवि अर्पण करून अन्नाची उत्पत्ती होते. पुरुषाच्या अग्नीत अन्नाची आहुती घालून रेताची उत्पत्ती होते. आणि स्त्रीरूपी अग्नीत रेताची आहुती टाकल्याने गर्भाची उत्पत्ती होते. यापुढील श्लोकात केलेले गर्भधारणा आणि गर्भसंवर्धनाचे संक्षिप्त वर्णन बऱ्याच प्रमाणात आधुनिक गर्भवृद्धिशास्त्राशी जुळते.७४. क्रमाने शुक्र आणि शोणिताच्या संयोगाने झालेला हा गर्भ पहिल्या दिवशी कलल (amorphous), पाच रात्रीतून बुडबुडा, सात रात्रींनी अंडाकार, पंधरा दिवसांनी पिशवीसारखा होऊन षट्कोशांत स्थिरावतो आणि घन (viscid) होतो.७५.

**मासा क्रूरः शिरो द्वाभ्यां ग्रीवाद्यङ्गानि च त्रिभिः । चतुर्भिस्त्वग्रोमनखाः पञ्चभिः षड्भिरप्यथ ।।७६।।**
**नासास्याक्ष्यादिरन्ध्राणि सप्तभिश्चलनं च धीः । अष्टभिर्नवभिः पूर्णो देही भूत्वेश्वरं जगौ ।।७७।।**
**जातो मृतः शश्वदहं वियोनीर्-मयोषिता भक्तिपराङ्मुखेन ।**
**अवाङ्मुखं देव जरायुवीतं मामुद्धर त्रस्तमितो भजे त्वाम् ।।७८।।**
**एवं स्तुत्वा सूतिवायु-त्यक्तो विस्मृतलब्धधीः । रोरूयति जनुर्लब्ध्वा मोहितो माययेश ते ।।७९।।**
**अनभिप्रेतमापन्न आसनोत्थानचेष्टने । पराधीनतया भुङ्क्ते स व्यथां वक्तुमक्षमः ।।८०।।**

मासा क्रूरः, द्वाभ्यां शिरः, च त्रिभिः ग्रीवादि अङ्गानि, चतुर्भिः त्वक्, पञ्चभिः रोम+नखाः, अथ षड्भिः।७६। नासा, अक्षि आदि रन्ध्राणि, सप्तभिः चलनं, अष्टभिः धीः, नवभिः पूर्णः देही भूत्वा ईश्वरं जगौ।७७। अहं शश्वत् जातः, मृतः। मया भक्ति+पराक्+मुखेन वियोनीः उषिताः। (हे) देव, अवाक्+मुखं जरायु+वीतं त्रस्तं मां इतः उद्धर। त्वां भजे।७८। एवं स्तुत्वा सूति+वायु+त्यक्तः जनुः लब्ध्वा विस्मृत+लब्ध+धीः ते मायया मोहितः रोरूयति।७९। वक्तुं असमर्थः पर+अधीन+तया आसन+उत्थान+चेष्टने अन्+अभिप्रेतं आपन्नःसः व्यथां भुङ्क्ते।८०।

एका महिन्यात त्याला काठिण्य येते, दोन महिन्यांत मस्तक, तीन महिन्यांत गळा इत्यादि अवयव, चार महिन्यांनी त्वचा, पाच महिन्यांनी रोम आणि नखे, सहा महिन्यांत(७६) नाक, डोळे इत्यादि छिद्रे, सात महिन्यांत हालचाल, आठ महिन्यांत पूर्वसंस्कारांनी युक्त निश्चयात्मिका बुद्धी प्राप्त होऊन नऊ महिन्यांत तो सर्वांगपरिपूर्ण देह धारण करतो आणि ईश्वराची प्रार्थना करतो.७७. 'देवा, मी तुझ्या भक्तीकडे पाठ फिरवून किती वेळा तरी जन्मलो आणि किती तरी वेळा मरण पावलो. नाना नाना योनींत कष्ट भोगले. आता मी खाली तोंड करून ह्या जारांत गुंडाळलेला गर्भाशयात त्रासून गेलो आहे. इथून माझी सुटका कर. मी तुझी भक्ती करीन.'७८. अशी स्तुती करून तो प्रसूतीच्या वायूद्वारा गर्भाशयातून बाहेर ढकलला जातो. जन्म झाल्याबरोबर त्याला आधी मिळालेली बुद्धी विसरून जातो आणि तुझ्या मायेच्या भुलीने रडायला लागतो.७९.

**ततोऽपि क्रीडनासक्तो वयस्यैरज्ञभावगः । तारुण्ये विषयासक्तो मत्तो दुर्जनसङ्गतः ।।८१।।**
**देवमायां स्त्रियं प्रेक्ष्य तद्भावैरजितेन्द्रियः । भोगोत्सुकः खलोऽज्ञात-कार्याकार्यो दुरध्वगः ।।८२।।**
**वार्धक्ये स्वजनत्रस्तो रुग्णोऽस्वस्थो जराकृशः । श्वासकासकफाविष्टः सम्भवत्यजितेन्द्रियः ।।८३।।**
**शतायुरपि रात्र्यार्धं हृतं शिष्टमपीदृशम् । कथंकारं नृजन्मापि श्रेष्ठं भक्त्या विना त्वयि ।।८४।।**

ततः अपि अज्ञ+भाव+गः वयस्यैः क्रीडन+आसक्तः। तारुण्ये विषय+आसक्तः मत्तः दुर्जन+सङ्गतः।८१। अजित+इन्द्रियः देव+मायां स्त्रियं प्रेक्ष्य तत्+भावैः भोग+उत्सुकः खलः अज्ञात+कार्य+अकार्यः दुः+अध्वगः।८२। वार्धक्ये स्वजन+त्रस्तः रुग्णः अस्वस्थः, अजित+इन्द्रियः श्वास+कास+कफ+आविष्टः संभवति।८३। शतायुः अपि रात्र्या अर्धं हृतम्। शिष्टं अपि ईदृशम्। नृजन्म अपि त्वयि भक्त्या विना कथंकारं श्रेष्ठम्।८४।

त्या नवजात तान्ह्याला आपल्याला काय हवे नको ते बोलताही येत नाही. उठणे, बसणे, चालणे या सर्व गोष्टींत तो पराधीन असतो. त्याला हवे असते एक आणि मिळते भलतेच. अशा अवस्थेत होणाऱ्या व्यथा तो भोगीत असतो.८०. त्यानंतर बाल्यावस्थेत तो अजाणच असतो. सवंगड्यांबरोबर खेळण्यातच मग्न असतो. तारुण्यात विषयांची अनिवार ओढ, धनजनाची मस्ती, दुर्जनांची संगती,(८१) इंद्रियवशता यांमुळे ईश्वरी मायेचेच रूप असलेल्या स्त्रियांना पाहून भोगाच्या लालसेने पेटलेला असतो. अशा रीतीने त्याचा कार्य आणि अकार्य यांचा विवेकही नष्ट होतो आणि तो वाकड्या मार्गाला लागतो.८२. म्हातारपणी आपलेच म्हणवणारे त्याला त्रासून टाकतात. रोग आणि अस्वस्थता त्याचा जीव नकोसा करतात. इंद्रियांवर ताबा नसतोच. त्यामुळे दमा, खोकला, कफ यांचा प्रादुर्भाव होतो.८३. माणसाचे आयुष्य अगदी शंभर वर्षे धरले तरीही रात्री झोपण्यातच निम्मे निघून जाते. उरलेल्याचीही गती ही अशी होते. हा मनुष्यजन्म शास्त्रांनी आणि पुराणांनी नावाजलेला असला तरी देवा, तुझ्या भक्तीवाचून तो कसा श्रेष्ठत्वाला पोचेल?८४.

**तत्साफल्यं नवविध-त्वद्भक्त्यासक्तसङ्गतिः । त्वयि भक्तिः साधने द्वे त्वां याचे भक्तवत्सल ॥८५॥**
**भो जनात्रावतीर्णोऽयं सद्धर्मत्राणकारणः । परमात्मा परं ब्रह्म लीलाधाम्नैष नो नरः ॥८६॥**
**सेव्यताममृतत्वाय योगैर्वा श्रवणादिना । भजतोऽनुभजत्येष भगवान् भक्तिभावनः ॥८७॥**
**यथा तृणौघोऽग्निस्पर्शाद् भस्मसाज्जायते तथा । निःशेषाघं कृपांशेन निर्दग्धं मेऽमुना तथा ॥८८॥**
**भगवन् कति ते वाच्या वाङ्मनोऽविषया गुणाः । श्रुत्या नेतीति सिद्धेपि श्रद्धावद्योगिगोचर ॥८९॥**

(हे) भक्तवत्सल, तत्+साफल्यं नवविध+त्वत्+भक्ति+आसक्त+सङ्गतिः (च) त्वयि भक्तिः द्वे साधने त्वां याचे।८५। 'भो जनाः। अयं परं+आत्मा परं ब्रह्म, लीला+धाम्ना सत्+धर्म+त्राण+कारणः अत्र अवतीर्णः। एष नो नरः।८६। योगैः वा श्रवणादिना (भवद्भिः) सेव्यताम्। एष भक्तिभावनः भजतः अनुभजति।८७। यथा तृण+ओघः अग्नि+स्पर्शात् भस्मसात् जायते तथा अमुना कृपा+अंशेन मे निःशेष+अघं निर्दग्धम्'।८८। '(हे) भगवन्! (हे) श्रद्धावत्+योगि+गोचर, श्रुत्या 'न इति' इति सिद्धे अपि (ते रूपे) ते वाक्+मनः+ अविषयाः गुणाः कति वाच्या?'।८९।

भक्तांच्या जिवलगा, त्या नरजन्माचे सार्थक, तुझे श्रवण, कीर्तन, स्मरण, सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि तुला आत्मनिवेदन अशा नवविध भक्तीत रंगलेल्यांची संगती (१) आणि तुझी भक्ति (२) हीच दोन साधने आहेत. ती मला लाभोत हीच याचना तुझ्या चरणी करीत आहे.८५.

'लोक हो! ह्या श्रीगुरूंना सामान्य माणूस असे समजू नका. हा साक्षात् परमात्मा आहे. अतीव प्रेमास्पद असल्याने हाच परब्रह्महीही आहे. हा साधू आणि धर्म यांच्या रक्षणासाठी लीलादेह धारण करून आला आहे. (ह्या विशेषणांनी त्यांच्या अवताराचे प्रयोजन आकार घेण्याचे कारणही सांगितले आहे.)८६. म्हणून सर्वांना माझे सांगणे आहे की अष्टांगयोगाने, निष्काम कर्मयोगाने किंवा श्रवणादि भक्तीने याची उपासना करा. कारण हा भक्तिभावन आहे; भजन करणाऱ्यांवर अनुग्रह करणारा आहे. *भजन* याचा अर्थ *निरंतर स्मरण, अनुसंधान.* भ.पू. पा. शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र भाष्यात म्हटल्याप्रमाणे 'दूरदेशी गेलेल्या पतीचे ज्या उत्कंठेने पत्नी स्मरण करते,'

**इत्यादिना बहु स्तुत्वा पदोः प्रणिपपात सः । शिष्टं कुष्ठं तदा नष्टं विशिष्टेष्टसुतुष्टितः ।।९०।।**
**तत्रैव स्थापयामास तं दत्त्वेष्टं वरं प्रभुः । सोऽप्यानीय वधूं स्थित्वा व्यरचद्विविधाः कथाः ।।९१।।**

इति आदिना सः पदोः प्रणिपपात। तदा शिष्टं कुष्ठं विशिष्ट+इष्ट+सुतष्टितः नष्टम्।९०। तं इष्टं वरं दत्वा प्रभुः तत्र एव स्थापयामास। सः अपि वधूं आनीय स्थित्वा विविधाः कथाः व्यरचत्।९१।

तीच उत्कंठा इथे अभिप्रेत आहे. भक्तिशास्त्रमय बुद्धीने ईश्वराशी तादात्म्य पावलेल्या अभिमानाने भक्तिविषयात दीर्घकाल स्थिरावणे ह्यालाच उपासना असे नाव आहे. ह्या तादात्म्यावस्थेतूनच आनंद प्रकटतो. 'समाधीने सर्व चित्ताचे मल धुवून टाकल्यावर आत्म्यांत प्रविष्ट झाल्याने जे सुख होते ते अंतःकरणातच भोगता येते, वाणीने वर्णन करण्याजोगे नाही' असे पंचदशीत (११:११८) म्हटले आहे ते याच अर्थाने (*समाधिर्निधूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत्। न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते।।*).८७. 'गवताची बनीम आगीच्या एका ठिणगीने जळून जावी तसे माझ्या पापाचे डोंगर ह्या श्रीगुरूंच्या कृपालेशाने निःशेष भस्मसात् केले आहेत.'८८. या श्लोकात श्रद्धावान् योग्यांच्याच दृष्टी पडणारा असे संबोधन हेतुगर्भ आहे. वेदांनी सुद्धा 'स्थूल नाही, अणु नाही', 'नाही नाही, असे नाही' असा निर्णय केलेले मन-वाणीला अगोचर असे तुझे गुण किती म्हणून गावेत?'८९ अशा प्रकारे नानाविध स्तोत्रांनी श्रीगुरूंचे स्तवन करून नन्दीने त्यांच्या चरणांवर दंडवत घातला. तेव्हा विशेष विद्वानांनाच इष्ट असणारा तो श्रीगुरुनाथ प्रसन्न झाला आणि त्या नंदीचे उरलेसुरले कोडही नाहीसे झाले. मनुस्मृतीत शिष्ट शब्दाची व्याख्या 'ज्यांनी वेद आणि वेदांगाचा धर्मानुसार अभ्यास केला ते ब्राह्मण' अशी केली आहे (*धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः। ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः।।* १२.१०९।।).९०.

त्याला हवा असलेला वर देऊन नृसिंहप्रभूंनी तिथे गाणगापुरांतच त्याना राहवून घेतले. नन्दीही आपल्या कुटुंबाला घेऊन तिथे स्थायिक झाला आणि श्रीगुरूंच्या स्तवनपर अशी काव्ये केली.९१.

**कवितां प्रसृतां लोके तस्य ज्ञात्वा नृकेसरी । कश्चित्कविरमंस्तेयं गर्ह्योदारापि नृस्तुतिः ।।९२।।**
**तद्ग्रामे केनचिन्नीतो गुरुस्तस्मै व्यदर्शयत् । उपास्यकल्लेशलिङ्गस्थं स्वं रूपं हृदर्चने ।।९३।।**
**पञ्चभिस्तं नवैः श्लोकैर् नित्यवन्मानसार्चने । स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह क्वास्ते कल्लेश्वरो वद ।।९४।।**
**तच्छ्रुत्वा स तदा ध्यानं विसृज्य भगवान्स्वयम् । नृरूपेणावतीर्णोऽयमिति मत्वान्वगाद्गुरुम् ।।९५।।**

तस्य कवितां लोके प्रसृताम्। ज्ञात्वा कश्चित् नृकेसरी कविः उदारा अपि अयं नृ+स्तुतिः गर्ह्या अमंस्त।९२। तत् ग्रामे केनचित् नीता गुरुः तस्मै उपास्य+कल्लेश+लिङ्ग+स्थं स्वं रूपं हृत्+अर्चने व्यदर्शयत्।९३। नित्यवत् मानस+अर्चने पञ्चभिः नवैः श्लोकैः स्तुवन्तं श्रीगुरुः प्राह। 'ते कल्लेश्वर क्व आस्तेः? वद।'९४। तत् श्रुत्वा सः तदा ध्यानं विसृज्य 'अयं स्वयं भगवान् नृरूपेण अवतीर्णः,' इति मत्वा गुरुं अन्वगात्।९५।

त्याची कविता सर्व लोकात प्रसार पावली. नरकेसरी नावाच्या एका कवीच्या कानांवर त्या कविता पडल्या. 'कविता चांगल्या आहेत त्या मानवाच्या स्तुतीपर असल्याने निंद्यच आहेत,' असा विचार त्याच्या मनात आला.९२. एकदा कुणी भक्ताने श्रीगुरूंना नरकेसरीच्या गावी आणले असता तो आपल्या नित्यनेमानुसार कल्लेश्वराची पूजा करीत होता. त्या वेळी त्याला कल्लेश्वराच्या जागी श्रीगुरूच दिसू लागले.९३. रोजच्या नियमानुसार मानसपूजेत पाच नवीन रचलेल्या श्लोकांनी त्याने स्तुती केली. तेव्हा श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे, तुझा कल्लेश्वर कुठे आहे? सांग!'९४. ते ऐकून नरकेसरीने ध्यान विसर्जित केले आणि 'हे तर प्रत्यक्ष भगवंतच मानवरूपाने अवतरले आहेत,' असा निश्चय करून तो श्रीगुरूंकडे निघाला.९५.

**नृकेसरिर्गुरुं प्राप्य रचितैः पञ्चभिः शुभैः । श्लोकैस्तुष्टाव तं प्राह हित्वेशं स्तौषि किं नरम् ।।९६।।**

**।। नरकेसर्युवाच ।।**

**भवान्मयाज्ञभावेन मानुषो लौकिको मतः । कृपयापास्य मेऽज्ञानं सत्त्वं रूपं प्रदर्शितम् ।।९७।।**
**तेन नष्टोऽद्य मे मोहस्त्वत्प्रसादाज्जनार्दन । प्राक्पुण्यं फलितं मेऽदः शिष्यालौ मां नियोजय ।।९८।।**
**भगवानपि सुप्रीतस् तस्मै दत्वांशुकं वरम् । प्राह कल्लेश्वरं विप्र भज तत्रापि मत्स्थितिः ।।९९।।**
**स प्राह भगवन्तेऽदः प्रत्यक्षं रूपमुत्तमम् । हित्वोत्सहे न गन्तुं मां त्वत्पादाब्जे स्थिरीकुरु ।।१००।।**

नृकेसरिः गुरुं प्राप्य पञ्चभिः शुभैः रचितैः श्लोकैः तुष्टाव। तं प्राह 'ईशं हित्वा नरं स्तौषि किम्?'९६। नरकेसरि उवाच। 'मया अज्ञ+भावेन भवान् लौकिकः मानुषः मतः। कृपया मे अज्ञानं अपास्य सत्त्वं रूपं प्रदर्शितम्।९७। (हे) जनार्दन, तेन त्वत् प्रसादात् मे मोहः नष्टः। अदः मे प्राक् पुण्यं फलितम्। मां शिष्य+आलौ नियोजय।'९८। भगवान् अपि सुप्रीतः तस्मै वरं अंशुकं दत्वा प्राह, '(हे) विप्र, कल्लेश्वरं भज। तत्र अपि मत्+स्थितिः।'९९। सः प्राह। '(हे) भगवन्त, इदं प्रत्यक्षं उत्तमं रूपं हित्वा गन्तुं न उत्सहे। त्वत्+पाद+अब्जे स्थिरीकुरु'।१००।

नरकेसरीने श्रीगुरूंच्याकडे येऊन त्यांची आपण रचलेल्या पाच श्लोकांनी स्तुती केली. श्रीगुरू त्याला म्हणाले, 'अरे ईश्वराला सोडून मानवाची काय स्तुती करतोस?'९६. नरकेसरी उत्तरला, 'देवा, मी अज्ञानवश आपल्याला लौकिक माणूसच समजलो. आपणच कृपेने माझे अज्ञान निरसून सात्त्विक ज्ञानमय रूप दाखविले आहे.'९७. 'जनार्दना, त्या तुझ्या कृपाप्रसादाने माझा मोह नष्ट झाला आहे. हे माझे पूर्वपुण्यच फळाला आले आहे. मला आता आपण आपल्या शिष्यपंक्तीत मिळवून घ्यावे.'९८. भगवान् श्रीगुरूंनी प्रसन्न होऊन त्याला प्रीतीपूर्वक उत्तम वस्त्र दिले आणि म्हणाले, 'कल्लेश्वराचीच उपासना कर. त्यातही माझेच अस्तित्व आहे.'९९. नरकेसरी म्हणाला, 'आपले हे प्रत्यक्ष उत्कृष्ट रूप सोडून मला कुठेही जावेसे वाटत नाही. मला आपल्या पदकमलातच स्थिर करा!'१००.

**मद्धाम्न्याप्तोऽस्यनायासाद् भगवन् भक्तकामधुक् । दयाब्धे मा कुरूपेक्षां दयनीयतमस्य मे ।।१०१।।**
**इत्युक्त्वा स पपाताग्रे तमाश्वास्य दयानिधिः । शिष्यत्वेनोररीकृत्य स्वात्मसौख्यमुपादिशत् ।।१०२।।**
**एवं भूत्वा कवी द्वौ तौ संग्रथ्य हरिसत्कथाः । तत्कीर्तनाच्छ्रद्धयात्र कृतकृत्यौ बभूवतुः ।।१०३।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे भक्तिवर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ।।**

**आदितः एकविंशोऽध्यायः ।। सप्ताहपारायणे षष्ठः। अन्ते रसज्ञा वशा स्तोत्रं पठनीयम् । द्वितीयदिने आरम्भे गुरुस्तुतिः ।**

‘(हे) भक्त+काम+धुक् भगवन् अन+आयासात् मत्+धाम्नि आप्तः असि। (हे) दया+अब्धे, मे दयनीय+तमस्य उपेक्षां मा कुरु।’१०१। इति उक्त्वा सः अग्रे पपात। दयानिधिः तं आश्वास्य, शिष्यत्वेन उरीकृत्य स्व+आत्म+सौख्यं उपादिशत्।१०२। एवं तौ द्वौ कवी भूत्वा हरि+सत्+कथा संग्रथ्य श्रद्धया तत् कीर्तनात् कृतकृत्यौ बभूवतुः।१०३।

भगवंता, भक्ताची जणू कामधेनु असे आपण अनायासच माझ्या दारी आलेला आहात. दयासागरा, ह्या अतीव दयनीय अशा माझी उपेक्षा करू नका.१०१. असे बोलून त्या नरकेसरीने श्रीगुरूंच्या चरणी आपले शरीर झोकून दिले. तेव्हा श्रीगुरूंनी त्याला आश्वासन देऊन त्याचा शिष्य म्हणून स्वीकार केला आणि त्याला स्वात्मसौख्याचा उपदेश केला.१०२. असे हे दोन कवी होऊन गेले. श्रीगुरूंच्या पावन लीला त्यांनी ग्रथित केल्या आणि श्रद्धापूर्वक त्यांच्या कीर्तनाने ते कृतकृत्य झाले.१०३.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा तिसरा आणि प्रथमपासून एकविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

# ।। अथ द्वाविंशोऽध्यायः ।।

### ।। नामधारक उवाच ।।

**श्रुतो गुणानुवादोऽपि हरेस्तृप्तिर्न मे गुरोः । अतीव वर्धते तृष्णा शश्वच्छ्रवणपानतः ।।१।।**
**भवाननलसो नूनमुदारतम एव मे । पूर्वश्रेयःप्रभावेन सङ्गतोऽस्ति कृपाकरः ।।२।।**

### ।। सिद्ध उवाच ।।

**गुणानुवादक्षीराब्धेः कति पासि कथामृतम् । सच्चित्सुखस्य लीलानुरनन्तस्य परात्मनः ।।३।।**

नामधारक उवाच। हरेः गुरोः गुण+अनुवादः श्रुतः अपि मे तृप्तिः न। श्रवण+पानतः शश्वत् अतीव तृष्णा वर्धते।१। मे पूर्व+श्रेय+प्रभावेन भवान् अन्+अलसः उदार+तमः कृपा+करः सङ्गतः अस्ति।२। सिद्ध उवाच। सत्+चित्+सुखस्य नुः लीला+ अनन्तस्य परात्मनः गुण+अनुवाद+क्षीर+अब्धेः कथा+अमृतं कति पासि?३।

श्रीगणेशाय नमः। *बाविसीं आठ तनू धरुनि। आठहि गांवी दिवाळी करुनी। शूद्रशेती अमाप पिकवुनि। गाणगापुरची तीर्थे प्रकटविली।।१।।* नामधारक म्हणतात, 'आपल्या मुखातून इतका काळ पापतापहर श्रीगुरूंच्या गुणामृताचे कर्णाद्वारे सतत पान करूनही माझी तृप्ती कांही होतच नाही. उलट त्या अमृतपानाची तृष्णा वाढतच आहे.'१. 'आपल्यासारखा कृपाळू, दातार, निरलस वक्ता मला लाभला ही माझी पूर्वपुण्याईचा फळाला आली आहे!'२. सिद्ध म्हणतात, 'सच्चिदानंद, अनंत, परमात्म्याने मायामानुष रूपाने केलेल्या लीलांच्या गुणानुवादाच्या क्षीरसागरातले कितीसे कथारूपी अमृत तू पिऊ शकशील?' त्या कथामृताचे निःशेष पान तूच काय पण कुणीच करू शकणार नाही, असा त्यांचा अभिप्राय आहे. इथे सिद्धमुनींनी श्रीगुरूंचे परब्रह्मत्व निर्देशिले आहे.३.

**गुणान्कात्स्न्र्येन वक्तुं न क्षमः कोऽपीशितुस्त्वहम् । उच्चावचखगोड्डान-न्यायाद्वक्ष्ये यथामति ।।४।।**
**स भीमामरजातीर-विहारी भक्तवत्सलः । भक्ताधीनत्वमाश्रित्य सदाभूत्तन्मतानुगः ।।५।।**
**निराकारो निरीहोऽपि शुद्धसत्त्वस्वरूप्यजः । बुद्ध्या सङ्गत्य लीलार्थं स्वयं विश्वात्मकोऽभवत् ।।६।।**
**सर्वत्र स्थितिमांस्त्वेष पश्येयुर्मुनयो हि माम् । इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः ।।७।।**

कः अपि गुणान् कात्स्र्येन वक्तुं न क्षमः। अहं तु उच्च+अवच+खग+उड्डान+न्यायेन यथामति वक्ष्ये।४। सः भीमा+अमरजा+तीर+विहारी भक्तवत्सलः भक्त+अधीनत्वं आश्रित्य सदा तत्+मत+अनुगः अभूत्।५। निः+आकारः निः+ईहः शुद्ध+सत्त्व+स्वरूपी अजः अपि स्वयं लीला+अर्थं बुद्ध्या सङ्गत्य विश्व+आत्मकः अभवत्।६। एष तु सर्वत्र स्थिति+मान्, 'मां मुनयः पश्येयुः' इति मत्वा त्रिधा भूत्वा त्रिषु लोकेषु संस्थितः।७।

त्याचप्रमाणे त्या भगवद्गुणांचे वर्णन पूर्णपणे करणे कुणालाही शक्य नाही. अनंत आकाशात आपापल्या शक्त्यनुसार कमी अधिक उंचीची झेप घेणाऱ्या पक्षांप्रमाणे मी यथामती सांगत आहे.'४. 'भीमा आणि अमरजा यांच्या तीरावर भक्तांच्या उद्धाराची लीला करणारा तो भक्तवत्सल श्रीगुरू भक्तांच्या अधीन होऊन नेहमी त्यांच्या मतानुसार वागत असे.'५. सद्गुरू भगवान् भक्तांच्या मर्जीने वागतात तर त्यांना साकार म्हणावे की निराकार? या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मसूत्रानुसार (३ः२ः११) असेच द्यावे लागेल की ते न तर साकार आहे न निराकार. तत्त्वतः अरूपच आहे. साकार वा निराकार रूपाची कल्पना उपासनेच्या संदर्भात केली जाते. असे हे अरूप, संकल्परहित, शुद्धसत्त्वस्वरूप, निर्विकार परब्रह्म लीलेसाठी म्हणून महत्तत्त्वाशी मिळून विश्वात्मक झाले.६. सनकादिक मुनींना दृग्गोचर होण्यासाठी त्यांनी ब्रह्मा, विष्णू, महेश ही तीन रूपे धारण केली आणि सत्य, वैकुंठ आणि कैलास या तीन लोकांत राहिले.७.

**तत्रापि भुवि मे भक्ता भूयांसो मन्मयास्त्वहम् । तेषामगोचरोऽस्म्यस्मात् स्थेयं तत्रेत्यमंस्त सः ।।८।।**
**ततोऽत्र भगवान् भूमौ लीलाधाम्ना युगे युगे । भजतोऽनुभजत्येष श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।९।।**
**किं वर्ण्यते भगवतो भक्तवात्सल्यमद्भुतम् । परिपूर्णोऽपि सन्तृप्तो भोक्तुं भ्रमति तद्गृहे ।।१०।।**
**अन्या अपि तु तल्लीलास् तादृश्यः सन्त्यनन्तशः । स्वकृते तु न ता विद्धि भक्तानुग्रहलक्षणाः ।।११।।**
**कलौ घोरेऽत्र नो भाग्यमुदितं हि युगे युगे । दुर्लभस्तपसापीशः स्मृत्यैव सुलभोऽत्र नुः ।।१२।।**

तत्र अपि 'भुवि मे मन्मया भक्ताः भूयांसः। अहं तु तेषां अगोचरः अस्मि। अस्मात् तत्र स्थेयं' इति सः अमंस्त।८। ततः भगवान् अत्र भूमौ युगे युगे लीला+धाम्ना (अवतीर्य) भजतः अनुभजति। एष प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।९। भगवतः अद्भुतं भक्तवात्सल्यं किं उ वर्ण्यते? परिपूर्णः संतृप्तः अपि तत् गृहे भोक्तुं भ्रमति।१०। तादृश्यः अन्या अपि तु तत्+लीलाः अनन्तशः सन्ति। ता न तु स्व+कृते, भक्त+अनुग्रह+लक्षणाः विद्धि।११। अत्र घोरे कलौ नः भाग्यं हि उदितम्। युगे युगे तपसा अपि दुर्लभः ईशः अत्र नुः स्मृत्या एव सुलभः।१२।

त्यातही 'भूलोकात माझे किती तरी मन्मय झालेले भक्त आहेत त्यांना मात्र माझे दर्शन होत नाही, तिथेही मला जायला पाहिजे' अशी करुणा त्यांच्या मनांत उपजली.८. तेवढ्यासाठी भगवंत ह्या भूलोकावर लीलादेह धारण करून युगांयुगांतून अवतरून आपल्या भक्तावर अनुग्रह करीत असतो. कारण याला श्रद्धा आणि भक्ती फार आवडतात.९. या भगवंताचे भक्तवात्सल्य किती म्हणून वानावे? हा स्वयं परिपूर्ण आहे आणि सदैव तृप्त आहे. तरीही त्या भक्तांच्या दारोदार भिक्षेच्या निमित्ताने हिंडत असतो!१०. 'अशाच त्या प्रभूच्या अगणित लीला आहेत. पण त्या सर्वही तो स्वतःसाठी नव्हे तर भक्तांवर अनुग्रह करण्याच्या हेतूनेच करतो हे ध्यानात ठेव.११. ह्या घोर कलियुगात आपले भाग्य खरेच उगवले आहे; इतर युगात तपादि सायासांनीसुद्धा दुर्लभ असलेला हा ईश्वर मानवांना केवळ स्मरणमात्रे सुलभ झाला आहे.'१२.

**स एष भगवांस्तत्र भक्ताधीनतयान्वहम् । निमन्त्रितो भक्तगेहे भिक्षान्नं बुभुजे प्रभुः ॥१३॥**
**दीपावल्युत्सवे सप्त प्रिया भक्ता जगद्गुरुम् । स्वे स्वे गृहे नेतुकामा भिन्नवासाः समाययुः ॥१४॥**
**भवन्तं नेतुकामोऽद्य दीपाल्यां पञ्चवासरम् । प्राप्तोऽस्म्यद्यैव गन्तव्यमित्येकैकोऽब्रवीद् गुरुम् ॥१५॥**

**॥ श्रीगुरुरुवाच ॥**

**यूयं सप्तैक एवाहमेककालीन उत्सवे । सप्तग्रामेष्वेकदैव कथं मे गमनं भवेत् ॥१६॥**
**एकत्रैकैकघस्रे वा गतिरेकैकसद्मनि । सम्भवेच्चेत्कृतं तद्वद् भवद्भिर्मे वरं द्विजाः ॥१७॥**
**भक्ताधीनोऽस्मि मां यो यो नयेद्यास्यामि तत्र च । तच्छ्रुत्वान्योन्यं कलहं चक्रुर्नेष्याम्यहं त्विति ॥१८॥**

सः एष भगवान् प्रभुः तत्र भक्त+अधीनतया अनु+अहं भक्त+गेहे निमन्त्रितःभिक्षा+अन्नं बुभुजे।१३। सप्त प्रियाः भिन्न+वासाः भक्ताः दीपावलि+उत्सवे स्वे स्वे गृहे नेतु+कामाः समाययुः।१४। एक+एकः गुरुं अब्रवीत्। 'अद्य भवन्तं दीपाल्यां पञ्चवासरं नेतु+कामः प्राप्तः अस्मि। अद्य एव गन्तव्यम्।'१५। श्रीगुरुः उवाच। 'यूयं सप्त, एक एव अहं, एक+कालीन उत्सवे सप्त+ग्रामेषु एकदा एव मे गमनं कथं भवेत्?१६। एकत्र, एक+एक+सद्मनि एक+एक+घस्रे वा गतिः सम्भवेत्। (हे) द्विजाः, भवद्भिः तत्+वत् कृतं चेत् मे वरम्।'१७। भक्त+अधीनः अस्मि। यः यः मां नयेत् तत्र च यास्यामि। तत् श्रुत्वा अन्यः अन्यं 'अहं तु नेष्यामि' इति कलहं चक्रुः।१८।

तोच हा भगवंत त्या गाणगापुरात भक्तपराधीन होऊन रोज ज्याचे आमंत्रण असेल त्या भक्ताच्या भिक्षेचे अन्न तो प्रभू जेवत असे.१३. एका दिवाळीच्या सणाला सात वेगवेगळ्या गावचे सात प्रिय भक्त जगद्गुरूंना आपापल्या घरी घेऊन जाण्याच्या इच्छेने आले.१४. प्रत्येक जण येऊन श्रीगुरूंना म्हणू लागला, 'महाराज, आज मी आपल्याला दिवाळीचे पाच दिवस आमच्या घरी नेण्यासाठी आलो आहे. आजच निघायला हवे!' श्रीगुरूंनी सर्वांना समजावले, 'हे पाहा, तुम्ही सात जण आहा आणि मी तर एकटाच आहे. एकाच वेळी दिवाळीसाठी सात गावी जाणे कसे शक्य आहे?१६. एक तर तुम्ही सगळे दिवाळी एकत्रच करा किंवा मी एकेका दिवशी एकेकाच्या घरी जाईन. अशी कांही योजना तुम्ही कराल तर मला बरे वाटेल.१७. 'मी केवळ भक्तपराधीन आहे. जो माझा भक्त जिथे कुठे मला घेऊन जाईल तिथे मी येईन.' श्रीगुरूंचे बोलणे ऐकून सगळे आपापसात 'श्रीगुरूंना मीच नेणार' 'नाही मीच नेणार' असे वादूं लागले.१८.

**निःस्वो धनीति द्वैतान्मां मा पाहि ह्यसि भो समः । भूतमात्रेऽत एहीति प्रोक्त्वा ते पतिताः पुरः ।।१९।।**
**निवार्य तान्सर्वगृहानेष्यामीत्युदितेऽपि ते । कैर्विश्वस्तव्यमित्यूचुर्भ्रान्ताः श्रीगुरुमीश्वरम् ।।२०।।**
**भगवानपि तद्भावं ज्ञात्वैकैकं रहो द्विजम् । सस्मितास्यः समाहूय प्राहोदारगिरा मुदा ।।२१।।**
**न वाच्यं क्वापि तेऽद्यैव गृहमेष्ये चरेत्यथ । तेऽपि सप्तैवमन्योन्यमशंसंतो ययुर्गृहान् ।।२२।।**

'भो निः+स्वः धनी इति द्वैतात् मां मा पाहि। भूतमात्रे समः असि। अत एहि।' इति प्रोक्त्वा ते पुरः पतितः।१९। तान् सर्वान् निवार्य, 'सर्व+गृहान् एष्यामि,' इति उदिते अपि ते भ्रान्तः ईश्वरं गुरुं ऊचुः, 'कैः विश्स्तव्यम्?' इति।२०। भगवान् अपि तत्+भावं ज्ञात्वा एके+एकं द्विजं रहः स+स्मित+आस्यः समाहूय उदारगिरा मुदा प्राह।२१। 'अद्य एव ते गृहे एष्ये। क्व अपि न वाच्यम्! चर।' इति। एवं ते सप्त अपि अन्यः अन्यं अशंसन्तः गृहान् ययौ।२२।

शेवटी सगळेच श्रीगुरूंना आपापल्या परीने गळ घालू लागले. 'भगवन्, अमुक गरीब, अमुक श्रीमंत असा भेद करू नका. आपण सर्व जीवांसाठी सम आहात. माझ्या घरी या.' असे म्हणून सगळ्यांनी श्रीगुरूंच्या समोर दंडवत घातले.१९. मग शेवटी त्या सर्वांना कसेबसे शांत करून श्रीगुरू म्हणाले, 'असे भांडू नका. मी सर्वांच्याच घरी येणार आहे!' श्रीगुरूंनी असे आश्वासन देऊनही, 'सर्वांनाच येतो म्हणता, मग कुणी विश्वास ठेवावा?' असे म्हणून त्यांनी साक्षात् परमेश्वरस्वरूप श्रीगुरूंवरच अविश्वास दाखविला.२०. आपल्या भक्तांची अंतरे जाणणाऱ्या भगवंताने हसऱ्या चेहऱ्याने, एकेका ब्राह्मणाला एकांतात बोलावून गंभीरपणे सांगितले,(२१) 'आजच मी तुझ्या घरी येणार आहे. कुणालाही सांगू नकोस! गुपचुप घरी जा.' अशा रीतीने ते सातही भक्त एकमेकांशी न बोलता मुकाट्याने आपापल्या घरी निघून गेले.२२.

**तत्रत्यैः क्व भवान् याति नो हित्वेत्युदितेऽत्र तु । तिष्ठामीति प्रभुः प्रोक्त्वाष्टौ ग्रामानेकदाभ्यगात् ।।२३।।**
**स्थलेषूवास पञ्चाहमष्टस्वपि जगन्मयः । लौकिकैकस्वरूपेण ततोऽस्थात् सङ्गमे प्रभुः ।।२४।।**
**स्वाद्वन्नशाटीकन्त्राण-पादुकार्पणसेवनैः । सन्तोषितः स भगवान् भक्तैराप मुहुर्मठम् ।।२५।।**
**पुनः सर्वेऽपि ते प्राप्ताः कार्तिक्यां तु परस्परम् । ऊचुर्मे धाम्नि पञ्चाहं दीपाल्यां संस्थितो गुरुः ।।२६।।**
**तत्रत्या अपि तं प्राहुः पञ्चाहं क्वापि नो गतः । अत्रैव प्रभुरस्माभिर् दीपावल्युत्सवं व्यधात् ।।२७।।**

तत्रत्यैः, 'भवान् नः हित्वा क्व याति?' इति उदिते, '(अहं) तु अत्र तिष्ठामि' इति प्रभुः प्रोक्त्वा, अष्टौ ग्रामान् एकदा अभ्यगात्।२३। जगत्+मयः अष्टेसु अपि स्थलेषु पञ्च+अहं उवास। ततः लौकिक+एक+स्वरूपेण प्रभुः सङ्गमे अस्थात्।२४। स्वादु+अन्न+शाटी+कं+त्राण+पादुका+अर्पण+सेवनैः भक्तैः सन्तोषितः भगवान् मुहुः मठं आप।२५। पुनः ते सर्वे अपि कार्तिक्यां प्राप्ताः परस्परं ऊचुः, 'गुरुः दीपाल्यां पञ्च+अहं मे धाम्नि संस्थितः।'२६। तत्रत्या अपि तं प्राहुः, 'प्रभुः पञ्च+अहं क्व अपि नो गतः। अत्र एव अस्माभिः दीपावलि उत्सवं व्यधात्।'२७।

हा सर्व प्रकार पाहून गाणगापुरच्या भक्तांनी विचारले, 'देवा, आपण दिवाळीत आम्हाला सोडून कुठे जाता?' त्यांना श्रीगुरू म्हणाले, 'मी तर इथेच थांबणार आहे!' असे त्यांचे समाधान करून सद्गुरुनाथ एकाच वेळी आठ गावांना गेले.२३. विश्वात्मक श्रीगुरू आठ गावांत नुसतचे गेले नाहीत तर त्या सर्वच गावी पाच दिवसपर्यंत राहिले. शिवाय एका (मुख्य) लौकिक स्वरूपाने संगमावरही राहिले.२४. गावोगावच्या भक्तांनी त्यांना गोडधोड जेवणाने, छाटी, शिरस्त्राण, पादुका इत्यादि अर्पण करून आणि त्यांची भक्तिभावाने सेवा करून त्यांना प्रसन्न केले. श्रीगुरूही आपल्या त्या सर्व प्रेमळ भक्तांचे समाधान करून मठात परतले.२५. पुनः ते सगळे कार्तिकी पौर्णिमेला श्रीगुरूंच्या दर्शनाला आले असता एकमेकांना सांगू लागले, 'गुरुमहाराज दिवाळीचे पाचही दिवस आमच्याकडेच होते!'२६. त्यांचा परस्परांतला वाद ऐकून गाणगापूरचे लोक त्यांना म्हणाले, 'महाराज कुठेही गेले नाहीत. दिवाळी इथेच आमच्याबरोबरच साजरी केली!' २७.

**मृषा मृषेति चान्योन्यं तदा प्रलपतो विभुः । तान्प्राह तूष्णीं स्थेयं भोः सर्वत्राहं गतः खलु ।।२८।।**
**तदा ते चकिताः सर्वे तुष्टुवुर्नतकन्धराः । भगवंस्ते परं पारं महिम्नोऽजानतां हि नः ।।२९।।**
**कथं लौकिकवाचस्त्वं स्तोत्रपात्रो भविष्यसि । श्रुतवाचामपि ब्रह्मन् न गुहाशयसंस्थित ।।३०।।**

तदा 'मृषा, मृषा' इति च अन्यःअन्यं प्रलपतः तान् प्रभुः प्राह, 'भोः तूष्णीं स्थेयम्। अहं सर्वत्र गतः खलु!'२८। तदा ते सर्वे चकिताः नत+कंधराः तुष्टुवुः। 'भगवन् ते महिम्नः परं पारं नः अजानतां हि।'२९। 'लौकिक+वाचः त्वं कथं स्तोत्रपात्रः भविष्यसि? (हे) गुहाशय+संस्थित ब्रह्मन्, श्रुत+वाचां अपि (स्तोत्रपात्रः) न।'३०।

तेव्हा, एकमेकांना 'खोटे, खोटे' असा प्रलाप करणाऱ्या त्या भक्तांना श्रीगुरूंनी शांत व्हायला सांगितले आणि म्हणाले, 'मी खरोखर सर्वांच्याच घरी होतो!'२८. तेव्हा आश्चर्यचकित होऊन सर्वांनी माना तुकवून श्रीगुरूंची स्तुती आरंभिली. 'भगवंता, तुझ्या महिमेचा परपार आम्हाला कळणे शक्य नाही.'२९. आमच्या ह्या लौकिक वाचेने तर आम्ही स्तुती करू शकतच नाही, पण हे गहन अंतरात राहणाऱ्या कूटस्थ ब्रह्मा, वेदांच्या वाचेलाही ते शक्य नाही. ब्रह्माला तैत्तिरीय उपनिषदांत (२:१:१) खोल अंतरात निहित असे म्हटले आहे (*निहितो गुहायाम्*). गुहाशय म्हणजे बुद्धी. तिच्या ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या त्रिपुटीतून होणाऱ्या व्यवहारातच भ्रांतिद्वारा भोग व विवेकाने मोक्ष निगूढ आहेत. आत्मस्वरूपही (ब्रह्म) त्या बुद्धीच्या माध्यमांतूनच उपलब्ध होते. म्हणून **गुहाशयांत संस्थित** असे विशेषण इथे योजले आहे. कठोपनिषदातही (१:३:१२) 'हा आत्मा सर्व जीवमात्रांत गूढरूपाने वास करतो; पण तो केवळ सूक्ष्म दृष्टीच्या ऋषींनाच त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीने दिसतो' असे म्हटले आहे. केनोपनिषदातही 'जे वाचेने व्यक्त होत नाही, ज्याने वाचा अभिव्यक्त होते' असे ब्रह्माचे वर्णन केले आहे. त्यानेही वाणीने त्याचे स्तोत्र करता येत नाही याचीच पुष्टी होते.३०.

**विश्वव्यापक तेऽनन्त दिव्यं जन्म क्रियाप्यज । नान्यार्थं नोऽमृतत्वार्थमवतारप्रयोजनम् ।।३१।।**
**श्रूयते दृश्यतेऽदो यत् त्वन्मायेयं दुरत्यया । मा वृणोत्विविति भो श्रीमन् देहि नो दक्षिणां वराम् ।।३२।।**
**इत्युक्त्वा प्रणतिं चक्रुस्तान्सन्तोष्य जगत्प्रभुः । सर्वान्प्रस्थापयामास स्वं स्वं धामापि ते ययुः ।।३३।।**
**एवं स भगवान्नूनं पूर्णः सच्चित्सुखात्मकः । भक्ताधीनतया चेष्टा दुर्विभाव्या व्यधादिह।।३४।।**

(हे) विश्व+व्यापक, (हे) अनन्त, (हे) अज, ते दिव्यं जन्म, क्रिया अपि न अन्य+अर्थम्। तव अवतार+प्रयोजनं नः अमृत+अर्थम्।३१। (हे) श्रीमन्, अदः यत् श्रूयते, दृश्यते इयं दुः+अत्यया त्वत्+माया नः न आवृणोतु इति वरां दक्षिणां देहि।३२। इति उक्त्वा प्रणतिं चक्रुः। जगत्+प्रभुः तान् सर्वान् संतोष्य प्रस्थापयामास। ते अपि स्वं स्वं धामं ययुः।३३। एवं सः पूर्णः सत्+चित्+सुख+आत्मकः भगवान् नूनं इह भक्त+अधीन+तया दुः+विभाव्या चेष्टा व्यधात्।३४।

'विश्वाला व्यापून राहिलेल्या, अनंत, निर्विकार सद्गुरो, तुझे अवतार आणि तुझ्या लीला अलौकिक आहेत. तुझ्या अवताराचे प्रयोजनहि अन्य कांहीही नसून आम्हा भक्तांचा मोक्ष हेच आहे.३१. श्रीमंता, हे जे कांही दिसणारे, ऐकले जाणारे इंद्रियगोचर जगत् आहे ती सर्व तुझी दुरत्यय माया आहे. तिच्या आवरणापासून आम्हांला मुक्त ठेव.' या प्रार्थनेत हे अभिप्रेत आहे की जीव हा परमात्म्याचाच अंश असल्याने त्याला वास्तव असा बंध नाही. मायेच्या आवरणाचा आभासिक बंधच आहे. 'ह्या जगाचा न निरोध आहे न उत्पत्ती आहे; इथे ना कुणी ना बद्ध आहे ना साधक; न कुणी मुमुक्षू आहे न कुणी मुक्त. अशी ही परमार्थता आहे,' या विद्यारण्यस्वामींच्या पंचदशीतील (*न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुर्न वा मुक्त इत्येषा परमार्थता।।* ६:२३५।।) वचनाचा हाच अभिप्राय आहे. म्हणून 'मायेच्या आवरणापासून आम्हाला मुक्त ठेव,' हीच श्रेष्ठ दक्षिणा त्या ब्राह्मणांनी मागितली आहे. दक्षिणा हा ब्राह्मणांचा अधिकारच आहे.३२. अशी प्रार्थना करून त्यांनी प्रभूंना प्रणिपात केले. जगन्नाथ सद्गुरूंनी त्या सर्वांचे समाधान करून त्यांना निरोप दिला. मग ते सर्व आपापल्या घरी गेले.३३. तो सच्चिदानंदस्वरूप भगवंत भक्तांना वश होऊन अशा मानवी बुद्धीला अगम्य अशा लीला करीत गाणगापुरांत राहिला होता.३४.

**जात्याचारवयोरूप-विद्यार्थगुणपौरुषम् । नापेक्षते हि भगवान् श्रद्धाभक्तिप्रियः प्रभुः ।।३५।।**
**शृणु चित्रं प्रवक्ष्यामि कश्चिच्छूद्रो गुरुप्रियः । दास्येनैवैहिकान् भोगान् भुक्त्वान्ते मुक्तिभागभूत् ।।३६।।**
**कृषीवलः स तु सदा स्वकर्मासक्त एव तम् । स्वक्षेत्रादामठं यांतं ननाम प्रत्यहं गुरुम् ।।३७।।**
**तद्गमागमसौख्यार्थं प्रत्यहं सङ्गमायनम् । अपास्य कण्टकाश्मादीन् सुगमं विशदं व्यधात् ।।३८।।**

भगवान् जाति+आचार+वयः+रूप+विद्या+अर्थ+गुण+पौरुषं न हि अपेक्षते। प्रभुः श्रद्धा+भक्ति+प्रियः।३५। 'चित्रं प्रवक्ष्यामि। शृणु। कश्चित् गुरु+प्रियः शूद्रः दास्येन एव ऐहिकान् भोगान् भुक्त्वा अन्ते मुक्ति+भाक् अभूत्।३६। सः कृषीवलः सदा स्व+कर्म+असक्तः एव। स्व+क्षेत्रात् आमठं यान्तं तं गुरुं प्रति+अहं ननाम।३७। प्रति+अहं तत्+गम+आगम+सौख्य+अर्थं सङ्गम+अयनं कण्टक+अश्मादीन् अपास्य सुगमं विशदं व्यधात्।३८।

त्या परमात्म्याला भक्ताकडून ब्राह्मणादि जाती; श्रौत वा स्मार्त आचार; बाल, युवा, वृद्ध आदि वय; सुंदर रूप; भौतिक वा आध्यात्मिक विद्या; संपदा; शांती, दया, क्षमा आदि गुण; प्राण, इंद्रिये वा शरीर यांचे बल या कशाचीही अपेक्षा नव्हती. त्यांना अपेक्षा होती तर ती केवळ दृढ श्रद्धा आणि गाढ भक्ती यांची! इथे श्रीगुरूंना **प्रभू** हे विशेषण लावण्यामागचा हेतू श्रीस्वामिमहाराजांनी टीकेत सांगितला आहे. भक्तांचे ईप्सित पुरविताना त्यांच्या प्रभुत्वामुळे त्यांना कोणीही अडवू शकत नाही. इथे त्यांनी ऋग्वेदाचा संदर्भ दिला आहे (८:८१:३).३५.

'असाच एक चमत्कार घडलेला तुला सांगतो, ऐक. श्रीगुरूंचा आवडता एक शूद्र भक्त होता.३६. तो शेतकरी आपले शेतीचे काम अनासक्त वृत्तीने करायचा. रोज मठाकडून येणाऱ्या श्रीगुरूंना तो साष्टांग नमस्कार घालायचा.३७. श्रीगुरूंना चालताना टोचू वा लागू नयेत म्हणून तो संगमाच्या वाटेवरील काटे, खडे इत्यादि बाजूला सारून तो रस्ता मऊ आणि रुंद करायचा.'३८.

**नत्वा पूर्ववदायान्तं मुदा तद्गतमानसः । कृषिं चकार तं दासं पृच्छति स्मैकदा गुरुः ।।३९।।**
**सदा मेऽग्रे कुतः शूद्र पतस्येतेन किं वद । साध्यं किं तेऽस्ति मनसि तदद्योद्घाटयाखिलम् ।।४०।।**

**।। शूद्र उवाच ।।**

**भजामि सुखकामस्त्वां क्षेत्रं ते कृपयाखिलम् । मनोज्ञं भाति तत्प्रेक्ष नोपेक्ष्यः पादजोऽप्यहम्।।४१।।**
**तदा सस्मितमीशोऽपि सर्वं क्षेत्रं विलोक्य तत् । आप्रादुर्भूतसस्यं तं प्राह द्राक् छिन्ध्यदोऽखिलम् ।।४२।।**

आयान्तं मुदा तत्+गत+मानसः पूर्ववत् नत्वा कृषिं चकार। तं दासं एकदा गुरुः एकदा पृच्छति स्म।३९। '(हे) शूद्र, सदा मे अग्रे कुतः पतसि? एतेन ते किं साध्यम्? ते मनसि किं अस्ति? तत् अखिलं अद्य उद्घाटय।'४०। शूद्र उवाच। त्वां सुख+कामः भजामि। ते कृपया अखिलं क्षेत्रं मनोज्ञं भाति। तत् प्रेक्ष। पादजः अपि अहं न उपेक्ष्यः।४१। तदा ईशः अपि सस्मितं तत् सर्वं आ+प्रादुर्भूत+सस्यं क्षेत्रं विलोक्य तं प्राह, 'अदः अखिलं द्राक् छिन्धि।'४२।

परत संगमाकडून श्रीगुरू आले की पहिल्यासारखाच दंडवत घालायचा आणि आपल्या शेतीच्या कामाला लागायचा. त्या दासाला एकदा श्रीगुरूंनी विचारले,(३९) 'काय रे शूद्रा! रोज का माझ्यासमोर आडवा पडतोस? तुला यातून काय साधायचे आहे? तुझ्या मनात तरी काय आहे? आज सगळे कांही मला सांग पाहू.'४०.

तो शेतकरी म्हणाला, 'सुखाच्या इच्छेने मी आपली भक्ती करतो. आपल्या कृपेने ही माझी शेती चांगली दिसतेय, तिच्यावर आपली कृपादृष्टी एकवार पडू द्या! शूद्र म्हणून माझी उपेक्षा करू नका.'४१. त्याच्या विनंतीला मान देऊन श्रीगुरू परमेश्वरांनी ते नुकत्याच अंकुरलेल्या पिकाने हिरवे दिसणारे सर्व रान पाहिले; आणि त्याला म्हणाले, 'हे सर्व लगेच कापून टाक!४२.

**विश्वासो मेऽस्ति वाक्ये चेच्छिन्धि मे यावदागमः । इत्युक्त्वा संगमं गत्वा प्रभुः कर्माह्निकं व्यधात् ।।४३।।**
**गत्वा शूद्रोऽपि पत्ये तु प्राह निश्चित्य ते करम् । क्षेत्रं देहीति स प्राह नेदं साध्वद्य कर्षक ।।४४।।**
**शश्वत्प्रार्थ्य परुद्दत्त-द्विगुणं भागमङ्घ्रिजः । दातुं निश्चित्य जग्राह प्रमापत्रमतोऽपि सः ।।४५।।**
**आहूयाथार्थलुब्धान्स लोकान्यावच्छिनत्ति तत् । सापत्या क्षेत्रमेत्य द्राग् वारयामास तं वधूः ।।४६।।**

मे वाक्ये विश्वासः अस्ति चेत् यावत् मे आगमः छिन्धि।' इति उक्त्वा प्रभुः सङ्गमं गत्वा आह्निकं कर्म व्यधात्।४३। शूद्रः अपि पत्ये गत्वा तु प्राह, 'ते करं निश्चित्य क्षेत्रं देहि' इति। स प्राह, '(हे) कर्षक, अद्य इदं न साधु।'४४। अङ्घ्रिजः शश्वत् प्रार्थ्य परुत्+दत्त+द्वि+गुणं दातुं निश्चित्य प्रमा+पत्रं जग्राह। अतः सः अपि (प्रमा+पत्रं जग्राह)।४५। अथ अर्थ+लुब्धान् आहूय लोकान् आहूय यावत् छिनत्ति तत् वधूः सापत्या द्राक् क्षेत्रं एत्य तं वारयामास।४६।

माझ्या वचनावर तुझा विश्वास असेल तर मी संगमावरून परत येईतोवर सगळे कापून टाक!' एवढे बोलून श्रीनरसिंह प्रभू संगमावर जाऊन आपल्या आह्निकात मग्न झाले.४३. इकडे तो शूद्र मालकाकडे गेला आणि म्हणाला, 'मालक, तुमचा कर पक्का करून मला शेत कापायला द्या.' मालकाने त्याला सांगितले की 'आज कांही ते शेत कापण्यायोग्य नाही.' त्यावर त्या शेतकऱ्याने वारंवार हात जोडून प्रार्थना केली आणि शेवटी गतवर्षीच्या दुप्पट कर देण्याचे मान्य करून त्याच्याकडून करारपत्र घेतले. त्या मालकानेही तसेच पत्र शेतकऱ्याकडून घेतले.४५.

मग त्या शूद्र भक्ताने द्रव्यलोभी कामकऱ्यांना बोलावून कापणीला सुरुवात केली. (कारण ही अकाळी कापणी करायला दुसरे कुणी आले नाहीत.) इतक्यात त्याच्या पत्नीला हे वृत्त समजून ती मुलाबाळांसह धावतपळत तिथे आली आणि त्याला अडवू लागली.४६.

**निधाः स्तोत्राणि मा छिन्धीति वदन्त्याः स कैशिके । चूर्णप्रतिनिधीकृत्य पद्धूलिं पुनराच्छिनत् ।।४७।।**
**स नोन्मत्तस्तु भरत-प्रन्हादकबिभीषणैः । मातापित्रग्रजास्त्यक्ता गुर्वर्थे का कथान्यतः ।।४८।।**
**सा गत्वेशं रुदत्यूचे मुण्डिवाक्यानुवर्त्यहो । क्षेत्रं छिनत्ति तेऽपक्कं प्रमत्तस्तं निवारय ।।४९।।**
**निवारणाय सोऽप्येकं दूतं प्रेरयदेत्य सः । तस्मै गम्भीरया वाचा स्वामिवाक्यं शशंस ह ।।५०।।**

'निधाः तोत्राणि, मा छिन्धि.' इति वदन्त्याः सः कैशिके पत्+धूलिं चूर्ण+प्रतिनिधि+कृत्य पुनः आच्छिनत्।४७। सः न उन्मत्तः। भरत+प्रन्हादक+बिभीषणैः तु माता+पितृ+अग्रजाः त्यक्ताः। गुरु+अर्थे अन्यतः का कथा?४८। सा रुदति ईशं गत्वा ऊचे, 'अहो, मुण्डि+वाक्य+अनुवर्ती प्रमत्तः ते अपक्कं क्षेत्रं छिनत्ति। तं निवारय।'४९। सः अपि निवारणाय एकं दूतं प्रेरयत्। सः एत्य तस्मै गम्भीरया वाचा स्वामि+वाक्यं शशंस ह।५०।

'विळे-कोयते खाली ठेवा! कापू नका!' असा ओरडा करणाऱ्या बायकोच्या केशांत पायधुळीचेच जणू चूर्ण घालीत तिला त्याने पिटाळून लावले. पायधुळीचे चूर्ण केसांत घातले याचा अर्थ तिच्या अंगावर धावून गेल्यावर ती पळत सुटली आणि तिच्या पायांनी उडालेली धूळ तिच्या केसांत गेली असा दिसतो.४७. बायकोच्या अंगावर असे धाऊन जायला तो काय वेडा झाला होता का? असे वाटू नये यासाठी म्हटले आहे. तो वेडा नव्हता. भगवद्भक्तांची निष्ठा ही अशीच असते. भरताने माता, प्रह्लादाने पिता आणि बिभीषणाने ज्येष्ठ भ्राता यांचा गुरूंसाठी म्हणजेच ईश्वरासाठी - तोच सर्वांचा गुरू आहे - त्याग केला. पत्नी इत्यादि अन्य नात्यांची गोष्ट काय वेगळी आहे का?४८. ती शेतकऱ्याची पत्नी रडत रडत मालकाकडे गेली आणि म्हणाली, 'अहो आमच्या धन्याला वेड लागलंय! त्या संन्याशाच्या सांगण्यावरून तुमचे शेत पिकायच्या आधीच कापायला निघालेत. तुम्ही तरी त्यांना आवरा!'४९. त्या मालकानेही एक निरोप्या शेतावर पाठविला. त्याने येऊन शूद्राला मालकाचा निरोप गंभीर वाणीने सांगितला.५०.

तं प्राह शूद्रोऽपि पत्ये शंसारब्धोद्यमस्य तु । पारं यास्ये नो बिभेमि तत्प्रमालिपिरस्त्यसौ ।।५१।।
दूतोऽप्यागत्य पत्ये तु तत्स्माचष्टेऽब्रवीत् स ताम् । शूद्र्यन्यथा कथं वाक्यं कार्यं सोऽप्यर्थधान्यवान् ।।५२।।
तच्छ्रुत्वा सा रुदत्याप क्षेत्रसीमां सुतान्विता । तच्छूद्रोऽप्यखिलं छित्वा गुर्वागममचिन्तयत् ।।५३।।
कृत्वाप्याह्निकमागच्छन्छान्तं सर्वमवेक्ष्य तम् । प्रणतं प्राह किमिदं कृतं साहजिकोक्तितः ।।५४।।
यदन्येन हृदापीदृक् कर्तुं शक्यं न भुव्यदः । कर्माद्य दुष्करं निन्द्यं त्वया कृतमतःपरम् ।।५५।।

शूद्रः अपि तं प्राह। पत्ये शंस, 'आरब्ध+उद्यमस्य तु पारं यास्ये! (अहं) न बिभेमि। असौ तत्+प्रमा+लिपि अस्ति।'५१। दूतः अपि आगत्य पत्ये तत् आचष्टे स्म। सः ताम् अब्रवीत्। '(हे) शूद्री, वाक्यं अन्यथा कथं कार्यम्? सः अपि अर्थ+धान्य+वान्।'५२। तत् श्रुत्वा रुदती सा सुत+अन्विता क्षेत्र+सीमां आप। तत् शूद्रः अपि अखिलं छित्वा गुरु+आगमं अचिन्तयत्।५३। आह्निकं कृत्वा आगच्छन् सर्वं शान्तं अवेक्ष्य प्रणतं तं प्राह, 'साहजिक+उक्तितः इदं किं कृतम्?'५४। 'भुवि यत् अन्येन हृदा अपि ईदृक् कर्तुं न शक्यं, अदः दुष्करं निन्द्यं कर्म अद्य त्वया कृतम्। अतः परं..'५५।

शूद्रानेही त्याला जवाब दिला. 'सांग मालकाला, आता हे सुरू केलेले काम मी तडीला नेणारच. मी कांही त्याला भीत नाही, हा पहा, त्याचा परवाना माझ्याकडे आहे.'५१. त्या निरोप्यानेही मालकाला जाऊन त्याचा जवाब सांगितला. तो त्या शेतकरणीला म्हणाला, 'बाई काय करणार? एकदा लिहून दिलेले पत्र परत कसे घेणार? आणि मला ठाऊक आहे मला कर देण्यासाठी त्याच्याकडे धान्यही आहे आणि पैसाही आहे.'५२. मग ती शूद्रस्त्री रडत रडतच मुलांसह शेताच्या बंधाऱ्याला आली. तोपर्यंत त्या शेतकऱ्याने सगळे शेत कापून टाकले होते आणि तो श्रीगुरू संगमावरून येण्याची वाट पहात होता.५३. श्रीगुरू आपले आह्निक करून संगमावरून आले आणि त्यांनी सगळ्या शेताची कापणी झालेली आणि सर्व सामसूम पाहिली आणि दंडवत घालीत असलेल्या शेतकऱ्याला म्हणाले, 'अरे, मी सहज बोलून गेलो; तर हे तू काय केलेस?'५५.

**कुतस्ते भविता वृत्तिर्दास्यसीशाय किं वद । अपक्वं हरितं सर्वं सस्यमेतद्वृथा गतम् ।।५६।।**
**स प्राहोक्तं कथमपि श्रुतवत्सद्गुरोर्वचः । तन्मेऽपि फलदं जन्म दत्तं येन स वृत्तिदः ।।५७।।**
**भक्तिश्चेदुक्तवद्भूयात्त इत्युक्त्वा ययौ गुरुः । सोऽप्याप स्वगृहं धीरो ध्यायन्हरिपदाम्बुजम् ।।५८।।**
**कालेनाल्पीयसा सूर्य इते मूलर्क्षमम्बुदः । ववर्ष च्छिन्नमपि तद्यावनालाद्यवर्धत ।।५९।।**
**प्रादुर्भूतानसंभाव्यानङ्कुरानभितोऽमितान् । दृष्ट्वा जल्हादिरे सर्वे शूद्र्यप्यत्यन्तहर्षिता ।।६०।।**

'(अतः परं) ते वृत्तिः कुतः भवति? ईशाय किं दास्यसि? वद। एतत् हरितं अपक्वं सस्यं सर्वं वृथा गतम्!'५६। सः प्राह, 'कथं अपि उक्तं सद्गुरोः वचं श्रुतवत्। तत् मे अपि फलदम्। येन जन्म दत्तं स वृत्तिदः!'५७। 'ते भक्तिः चेत् उक्त+वत् भूयात्।' इति उक्त्वा गुरुः ययौ। सः अपि धीरः हरि+पद+अम्बुजं ध्यायन् स्वगृहं आप।५८। अल्पेन कालेन सूर्यः मूल+ऋक्षं इते अम्बुदः ववर्ष। तत् छिन्नं अपि यावनालादि अवर्धत।५९। अभितः अमितान् असंभाव्यान् अङ्कुरान् प्रादुर्भूतान् दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे। शूद्री अपि अत्यन्त हर्षिता।६०।

'आतां तुझा निर्वाह कसा होईल? आणि मालकाला काय देणार? सांग बरे! छान उगवलेले हे हिरवे गार शेत सगळे नापीक वाया गेले!'५६. तो उत्तरला, 'सहज वा थट्टेने कसेही सद्गुरूंचे वचन हे वेदवाक्यासारखे आहे. मला तेसुद्धा उत्तम फलदायक ठरेल! निर्वाहाचे म्हणाल तर जो जन्म देतो तोच अन्नही देतो.' इथे श्रीस्वामिमहाराजांनी एक सुभाषित उद्धृत केले आहे. *यो मे गर्भगतस्यापि वृत्तीं कल्पितवान् विभुः। शेषवृत्तिविधानाय स वै सुप्तोऽथवा मृतः।।* ज्या भगवंताने गर्भात असतानाही माझ्या जीविकेची योजना केली तो उरलेल्या आयुष्याची सोय न करायला काय झोपलाय की मेलाय?५७. 'तुझी जर अशी भक्ती असेल तर तू म्हणशील तसेच होईल!' असे म्हणून श्रीगुरू मठाला गेले. तो धैर्यधर शूद्रही श्रीगुरूंच्या पदकमलांचे चिंतन करीत आपल्या घरी परतला.५८. कांही थोड्या काळाने सूर्य मूळ नक्षत्राला गेला असताना मेघ वर्षला. त्यायोगे छाटून टाकलेल्या त्या ज्वारी इत्यादि पीकांच्या धाटांना पुनः चारी बाजूनी अगणित असंभाव्य अंकुर फुटले. ते पाहून सर्वांना आनंद झाला. शूद्री तर हरखून गेली.६०.

**पत्युः पादौ सकारुण्यं गृहीत्वा गद्गदाक्षरा । बभाषे गुरुभक्तोऽसि मम मन्तून्क्षमस्व भोः ।।६१।।**
**तथेत्युक्त्वा तया शूद्रः प्रपूज्य क्षेत्रपं गुरुम् । यान्तं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतो वाक्यमब्रवीत् ।।६२।।**
**अङ्घ्री चिन्तामणिर्वाक्यं सुधास्पर्धि दयानिधे । ज्योतिर्मयो न वेत्त्यन्धो घूकोऽर्कमिव धाम ते ।।६३।।**
**दृष्टं समूढपुण्येन धाम ते दिव्यमद्भुतम् । कृतकृत्योऽस्म्यतो देव मां माधोक्षज विस्मर।।६४।।**

पत्युः पादौ स+कारुण्यं गृहीत्वा गद्गद+अक्षरा बभाषे, 'भोः गुरु+भक्तः असि। मम मन्तून् क्षमस्व।'६१। तथा इति उक्त्वा शूद्रः तया क्षेत्र+पं प्रपूज्य, यान्तं गुरुं क्षेत्रं दर्शयित्वा प्रणतः वाक्यं अब्रवीत्।६२। '(हे) दया+निधे, (ते) अङ्घ्री चिन्तामणिः, वाक्यं सुधा+स्पर्धि, धाम ज्योतिः+मयः घूकः अर्क इव अन्धः न वेत्ति।६३। (हे) देव, (मया अपि) समूढ+पुण्येन ते दिव्यं अद्भुतं धाम दृष्टम्। अतः कृतकृत्यः अस्मि। (हे) अधोक्षज, मां मा विस्मर।६४।

तिच्या डोळ्यांतून पाणी वाहू लागले. पतीचे पाय धरून भरलेल्या कंठाने ती म्हणाली, 'अहो, तुम्ही खरेच गुरुभक्त आहात. माझ्या अपराधांची क्षमा करा.'६१. 'बरं, बरं' असे तिला म्हणून तिच्याबरोबर शेताला जाऊन त्याने क्षेत्राचे रक्षण करणाऱ्या देवाची पूजा केली. इथे **क्षेत्रप** या शब्दावर श्लेष करून श्रीस्वामिमहाराजांनी क्षेत्रप म्हणजे *क्षेत्रज्ञ* अर्थात् आत्मा असा अर्थ करून त्याच्या अज्ञानाने अश्रद्धा, त्यामुळे पतिनिंदा, श्रीगुरूंचा धिक्कार अशी दुष्कर्मे तिच्याकडून झाली. पण आता त्या आत्म्याच्याच प्रसादाने लौकिक लाभ दिसल्याने त्या तमोगुणाविष्ट शूद्रस्त्रीला दुर्लभ शांती प्राप्त झाली ही त्या क्षेत्रज्ञाचीच कृपा नाही का? अशा त्या अंतःस्थ आत्मरूपाचा सत्कार केला. त्याच वेळी श्रीगुरु तिकडून जात होते. त्यांना ती पिकलेली शेती दाखवून त्या शेतकऱ्याने साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला,(६२) 'दयासागरा, तुझे पाय चिंतामणी आहेत, तुझे वचन अमृताहून गोड आहे आणि तुझे स्वरूप ज्योतिर्मय आहे; परंतु दिवाभीताला सूर्य दिसत नाही तसे तुझे स्वरूप अज्ञानी जीवांना दिसत नाही. ते आज मी पाहिले. मी कृतकृत्य झालो! अधोक्षजा तुला माझा विसर पडू देऊ नको.'६४.

**तमाह श्रीगुरुः शूद्र धन्योऽस्यवरवर्ण ते । परितुष्टोऽस्मि दास्येन नूनं सद्गतिभाग्भव ।।६५।।**
**दुराचारोऽपि यदि चेत् सेवते मामनन्यधीः । स तु साधुर्हि तस्मात्त्वं स्वाचारो भक्तिमान् मयि ।।६६।।**
**अतस्ते दत्तमेतत्तु निवसेत् त्वत्कुलेऽमले । अचला कमला दास्यं मदीयं चाप्यसंशयम् ।।६७।।**
**इत्युक्त्वागाद्गुरुः सोऽपि गत्वेशं प्राह निश्चितात् । अधिभागं प्रदास्ये ते यतो धान्यर्धिरद्भुता ।।६८।।**

श्रीगुरुः तं आह, '(हे) शूद्र, अवर+वर्ण धन्यः असि। ते दास्येन नूनं परितुष्टः अस्मि। सत्+गति+भाक् भव।'६५। 'दुः+आचारः अपि यदि मां अनन्य+धीः सेवते चेत् स तु साधुः। हि तस्मात् स्व+आचारः (सु+आचारः) मयि भक्ति+मान्।६६। अतः ते एतत् तु ते असंशयं दत्तं, अचला कमला, मदीयं दास्यं अपि।'६७। इति उक्त्वा गुरुः अगात्। सः ईशं गत्वा प्राह, 'यतः अदभुता धान्य+ऋद्धिः ते निश्चितात् अधि+भागं प्रदास्ये'।६८।

त्याला श्रीगुरू म्हणाले, 'शूद्रा, तूं वर्णाने जरी कनिष्ठ असलास तरी धन्य आहेस! तुझ्या दास्यभक्तीने मी खरोखर पूर्ण प्रसन्न झालो आहे! तुला सद्गती लाभेल.'६५. श्रीगुरूंच्या बोलण्यात गीतेच्या (९:३०) श्लोकाचाच अनुवाद दिसतो. 'अगदी दुराचरणी जर अनन्यभावाने मला भजत असेल तर साधूच मानावा! तू तर आपल्या स्वतःचा (जातीचा) आचार पाळणारा आहेस. (उत्तम आचार करणारा आहेस असाही अर्थ करता येतो.) शिवाय माझी भक्ती करणारा आहेस.६६. म्हणून तुला माझे हे निःसंशय देणे आहे, स्थिर लक्ष्मी (संपत्ती) आणि माझे दास्य!' स्थिर संपत्ती दिल्यावर कदाचित् त्याच्याकडून प्रमाद घडू शकतो. म्हणून त्याला सन्मार्गावर स्थिरावणारे आपले दास्यही त्याला दिले आहे. इथे त्याला आत्मज्ञानाचा उपदेश का केला नाही अशी शंका घेण्याचे कारण नाही. शूद्राला उपनयनाभावी वेदांचा अभ्यास करता येत नाही. कुणी म्हणेल की ब्रह्मसूत्रानुसार (*तदुपर्यपि बादरायणः संभवात्।* १:३:२६) उपनयन न करताही देवांना वैदिक ज्ञान होऊ शकते तर शूद्रांना का नाही? देवांच्या बाबतीत त्यांना पूर्वजन्मार्जित पुण्याईने स्वयंप्रतिभेनेच वेदांचे ज्ञान असते. वेदांचे अध्ययन करावेच लागत नाही.

**स प्राह नान्यथोक्तिर्मे प्रसादात्सद्गुरोस्त्वियम् । लब्धा धान्यर्धिरनयं न स्पृशाम्यर्पयोक्तवत् ।।६९।।**
**परिपक्वं तदा दृष्ट्वा सस्यं छित्वानयद् गृहम् । कामं शेषं जनेभ्योऽदादमितं धान्यमुत्तमम् ।।७०।।**

सः प्राह, 'मे उक्तिःअन्यथा न। इयं धान्य+ऋद्धिः तु सद्गुरोः प्रसादात् लब्धा। अनयं न स्पृशामि। उक्तवत् अर्पय।'६९। तदा सस्यं परिपक्वं दृष्ट्वा छित्वा कामं गृहं आनयत्। शेषं अमितं उत्तमं धान्यं जनेभ्यः अदात्।७०।

त्यामुळे उपनयनसंस्काराची आवश्यकता नाही. शूद्राला वेदांच्या श्रवणाचा वा उच्चारणाचा अधिकार नसल्याने ते अध्यात्मविद्येचे अधिकारी कसे होतील? छांदोग्य उपनिषदात (४:२:५) रैक्वाने जानश्रुतीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करताना त्याला 'शूद्र' म्हटले आहे ते रूढ अर्थाने नाही. आपल्या विद्याराहित्याने दुःखी होऊन (*शुचा*) गुरूकडे धावणारा (*दुद्राव*) तो शूद्र असा अर्थ आहे. जानश्रुति वस्तुतः क्षत्रियच होता. मग शूद्रांना मुक्ती कशी मिळेल? महाभारतात शांतिपर्वात (३२८:४९) सांगितल्याप्रमाणे त्यांना पुराणश्रवणाचा अधिकार आहे. त्या श्रवणादिकांपासून त्यांना ज्ञानाचा अधिकार प्राप्त होऊन जन्मांतरी मोक्षलाभ होईल. धर्मव्याध वगैरे हीनयातीतल्या ज्ञान्यांची उदाहरणे पुराणात आहेत. त्यांच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासामुळे त्या जातीतही ज्ञानोदय झाला आहे. म्हणून शेतकऱ्याला केलेले दास्यदान योग्यच आहे.६७. असे म्हणून श्रीगुरू पुढे गेले. तो शेतकरीही मालकाकडे जाऊन म्हणाला, 'शेतांत अद्भुतरीत्या अमाप धान्य पिकले आहे. मी तुम्हाला ठरल्याहून अधिक धान्य देतो.'६८. तो मालक म्हणाला, 'मी माझा शब्द फिरवणार नाही! ही धान्यसमृद्धी तुला गुरूंच्या प्रसादाने झाली आहे. अन्यायाच्या कमाईला मी शिवणार नाही. आपला जेवढा ठराव झाला होता, तेवढेच मला दे.'६९. मग ते पिकलेले धान्य त्याने यथेष्ट घरी आणूनही उरले. तेव्हा त्याने कितीतरी धान्य लोकांना वाटून टाकले.७०.



A- 19-23.indd 572 10/3/2013 3:41:38 PM

**बहवो लेभिरे धान्यं प्रकामं सोऽपि सद्गुरोः । कृपया परया भूत्वा श्रीमान्सेवेऽतिनीचवत् ।।७१।।**
**तत्रेदृश्यः प्रभोर्लीलाः कति वृत्तास्तु कृत्स्नशः । न ज्ञाताः कैरपि पुरं मन्ये धन्यतमं तु तत् ।।७२।।**

**।। नामधारक उवाच ।।**

**सत्तमाश्रितकाश्यादि-क्षेत्रेषु भुवि सत्स्वपि । प्रीत्योवास कुतस्तत्र भगवान् मे वदस्व तत् ।।७३।।**

**।। सिद्ध उवाच ।।**

**तत्र तीर्थान्यनेकानि देवा अप्यखिलाः खलु । जगन्निवास उद्वीक्ष्य तस्थौ ध्रुवमधोक्षजः ।।७४।।**

बहवः प्रकामं धान्यं लेभिरे। सः अपि सद्गुरोः परया कृपया श्रीमान् भूत्वा अति+नीच+वत् सेवे।७१। तत्र ईदृशाः प्रभोः लीलाः वृत्ताः। कृत्स्नशः कैः अपि न ज्ञाताः। तत् पुरं तु धन्यतमं मन्ये।७२। नामधारक उवाच। 'भुवि सत्+तम+आश्रित+काशी+आदि+क्षेत्रेषु भुवि सत्सु भगवान् कुतः तत्र प्रीत्या उवास? तत् मे वदस्व।'७३। सिद्ध उवाच। 'जगत्+निवास तत्र अनेकानि तीर्थानि, अखिलाः देवाः अपि उद्वीक्ष्य अधोक्षजः ध्रुवं तस्थौ।'७४।

'खूप लोक हवे तेवढे धान्य घेऊन गेले. तो शूद्रही सद्गुरूंच्या कृपेने धनवान झाला. तरीही त्याला आढ्यतेचा स्पर्शही झाला नाही. तो अत्यंत दीनपणे सद्गुरूंची सेवा करीत राहिला.७१. अशा ह्या प्रभूंच्या किती तरी लीला त्या गाणगापुरात झाल्या. त्या सगळ्याच कुणालाही ठाऊक नाही. खरोखर ते गाव धन्यतम आहे.' ७२. नामधारकाने प्रश्न केला. 'मोठमोठ्या संतांनी सेविलेली काशी आदि अनेक क्षेत्रे ह्या भूमीवर आहेत. मग भगवंतांनी अत्यंत प्रीतीपूर्वक गाणगापूरलाच का वास्तव्य केले? कृपया मला सांगा.'७३. सिद्ध उत्तरले, 'त्यांचा निवास सर्व जगांत असला तरी भगवान अधोक्षज तिथे अनेक तीर्थे आणि सर्व देवांचे वास्तव्य पाहूनच राहिले आहेत.'७४.

**मन्दधीभिस्तु तीर्थानि तिष्येऽज्ञातानि तान्यतः । गुरुः प्राहैकदा लोकं पावनानि प्रदर्शयन् ।।७५।।**
**काशीं जिगमिषो लोक सर्वतीर्थानि चात्र तु । दर्शयामीति तान्प्रोक्त्वा तीर्थान्याह स दर्शयन् ।।७६।।**
**संगमोऽयं प्रयागोऽष्टौ तीर्थान्यत्र तु षट्कुले । त्रिवेणीसङ्गमोऽयं तु पापघ्न्यमरजेष्टदा ।।७७।।**
**जीवनायेशदत्तेन्द्र-नीयमानसुधाघटात् । युद्धे जालन्धरहत-देवानाममृतं च्युतम् ।।७८।।**
**किञ्चिच्च्युतादपि महा-प्रवाहोऽत्रामरत्वदः । कालमृत्युभयाघघ्नी जातैषामरजा ततः ।।७९।।**
**मनोरथाख्यं तीर्थं तु कल्पद्रवश्वत्थसन्निधौ । सन्तोषतीर्थमग्रेऽत्र रुद्रो विश्वेश्वरः स्वयम् ।।८०।।**

तिष्ये मन्द+धीभिः तीर्थानि अज्ञातानि। तानि पावनानि प्रदर्शयन् गुरुः एकदा लोकं प्राह,।७५। '(हे) काशीं जिगमिषः लोकः, सर्व+तीर्थानि तु अत्र दर्शयामि' इति तान् प्रोक्त्वा तीर्थानि दर्शयन् सः आह।७६। अय सङ्गमः प्रयागः। अत्र तु षट्कूले अष्टौ तीर्थानि। अयं तु त्रिवेणी+सङ्गमः। अमरजा पाप+घ्नी, इष्ट+दा (च)।७७। युद्धे जालंधर+हत देवानां जीवनाय ईश+दत्त+इन्द्र+नीयमान+सुधा+घटात् अमृतं च्युतम्।७८। किञ्चित् च्युतात् अपि अत्र अमरत्व+दः महाप्रवाहः। ततः एषा काल+मृत्यु+भय+अघ+घ्नी अमरजा जाता।७९। कल्पद्रु+अश्वत्थ+सन्निधौ तु मनोरथ+आख्यं तीर्थम्। अग्रे सन्तोष+तीर्थं अत्र रुद्रः स्वयं विश्वेश्वरः।८०।

कलियुगातील मंदबुद्धीच्या जीवांना मात्र ही तीर्थे अज्ञात असल्याने ती पावन तीर्थे प्रकट करण्यासाठी श्रीगुरू एकदा लोकांना म्हणाले,(७५) 'काशीयात्रेला जाऊ इच्छिणाऱ्या लोक हो, सर्वच तीर्थे मी तुम्हाला इथेच, गाणगापुरातच दाखवतो,' असे म्हणून ते सांगू लागले.७६. हा भीमा आणि अमरजा यांचा संगमच प्रयाग आहे. इथे षट्कूलात आठ तीर्थे आहेत. हा त्रिवेणीसंगमच आहे. ही अमरजा वांछित देणारी आणि पाप नासणारी आहे.७७. देव आणि दैत्यांच्या युद्धांत जालंधर नांवाच्या दैत्याकडून देवांचा मोठा संहार होऊ लागला. त्यावेळी त्यांना जिवंत करण्यासाठी भगवान शिवांनी दिलेला अमृताचा घडा इंद्र घेऊन जात असाताना त्यातील किंचित्से अमृत भूमीवर पडले.७८. त्या अमृतापासून हा अमरत्व देणारा महाप्रवाह निघाला. त्यापासूनच ही कालमृत्यू, भय आणि पाप यांना वारणारी अमरजा उगम पावली.७९. पुढे कल्पवृक्षसमान ह्या अश्वत्थाजवळ मनोरथ तीर्थ आहे. इथला हा रुद्र साक्षात् विश्वेश्वरच जाणा.८०.

**वामहस्तेन नन्द्यण्डं धृत्वाङ्गुष्ठं च तर्जनीम् । संस्थाप्य शृङ्ग्योर्मध्यात् कृतशैवीप्रदक्षिणः ।।८१।।**
**पश्येद्यदीशं मर्त्योऽपि देववच्छ्रीष्टयुग्भवेत् । साक्षात्काशीयमीशेन विहिता भक्ततुष्टये ।।८२।।**
**जीवन्मुक्तोऽत्र शैवः प्राग्लोके जड इतीरितः । येनाहिवज्जनो भोगा विषं स्त्रीः शववन्मताः ।।८३।।**

कृत+शैवी+प्रदक्षिणः वाम+हस्तेन नन्दी+अण्डं धृत्वा शृङ्ग्योः मध्यात् अङ्गुष्ठं च तर्जनीं संस्थाप्य,।८१। मर्त्यः अपि यदि ईशं पश्येत् देववत् श्री+इष्ट+युक् भवेत्। ईशेन भक्त+तुष्टये विहिता इयं साक्षात् काशी।८२। प्राक् अत्र जीवन्+मुक्तः शैवः लोके जड इति ईरितः। येन जनः अहि+वत्, भोगाः विषं, स्त्रीः शव+वत् मताः।८३।

या शंकराला शैवा प्रदक्षिणा करून, डाव्या हाताने नंदीचे वृषण धरून व शिंगांवर अंगठा आणि तर्जनी ठेवून(८१) शंकराचे जो दर्शन घेईल तो मर्त्य मानवसुद्धा देवासारखा धन आणि स्त्री, अन्न, पान इत्यादि इष्ट भोगांनी युक्त होतो. ही भगवान शंकरांनी भक्ताच्या तोषासाठी स्थापन केलेली साक्षात् काशीच आहे.८२. पूर्वी इथे एक शंकराचा जीवन्मुक्त, सदैव निरतिशय आनंदांत निमग्न झालेला भक्त रहात होता. लोक त्याला वेडा म्हणत. त्याने लोक सापासारखे मानून त्यांचा संग टाकला होता. कारण लोकरूपी सापाच्या दंशाने दुर्वासनांचे विष मनात भिनून विषयबाधा होते आणि कामादिवेदनांनी कष्टत तो साधू, प्रमाद नावाच्या मृत्यूला बळी पडतो. भोगांना तो विषच मानी. भोग काय किंवा विष काय शरीरात भिनून मृत्यूला कारण होतात. विषयतादात्म्याने प्रमाद - स्वरूपाचे विस्मरण होणे हे मरणच आहे. स्त्री त्याला प्रेतासारखी वाटते. दिवसा गिधाडे जशी प्रेतावर उड्या टाकून त्याचे लचके तोडतात आणि लांडगे-कोल्हे एकांतात रमतात, तसेच ह्या स्त्रीरूप प्रेताशी विषयासक्त लोकांचे वर्तन असते. म्हणून स्त्री दृष्टीला पडली तरी स्नान करावे असे त्या शिवभक्ताचे मत होते.८३.

**कदाचित्स सदा युक्तः प्रमाथीन्द्रियसंयमी । बन्धूनाहात्र काशीयं त ऊचुर्दर्शयाद्य नः ॥८४॥**
**स दध्यावीशमीशोऽपि तदैत्याहेप्सितं वद । स प्राहाद्य त्वया सार्धं काशीं संस्थापय ध्रुवाम् ॥८५॥**
**तथेत्युक्त्वेश्वरोऽगात्तज् जलान्तः कुण्डमुत्तमम् । उद्भूतं तत्र विश्वेश-मूर्तिराविरभूत्क्षणात् ॥८६॥**
**काश्यां चिह्नानि यान्यत्र जातान्यालोक्य तानि सः । स्वजनान्दर्शयित्वोचे काशीयं क्वापि यात नो ॥८७॥**

सदा युक्तः प्रमाथी+इन्द्रिय+संयमी सः कदाचित् बन्धून् आह, 'अत्र इयं काशी।' ते ऊचुः, 'अद्य नः दर्शय!'८४। सः ईशं दध्यौ। ईशः तदा एत्य आह, 'ईप्सितं वद।' सः प्राह, 'अद्य त्वया सार्धं ध्रुवां काशीं संस्थापय।'८५। ईश्वरः 'तथा' उक्त्वा अगात्। तत् जल+अन्तः उत्तमं कुण्डं उद्भूतम्। तत्र क्षणात् विश्वेश+मूर्तिः आविरभूत्।८६। यानि काश्यां चिह्नानि तानि अत्र जातानि आलोक्य सः स्व+जनान् दर्शयित्वा ऊचे, 'इयं काशी। क्व अपि नो यात।'८७।

निरंतर आत्मस्वरूपाशी युक्त असलेला आणि बलिष्ठ इंद्रियांवरही ताबा असलेला तो पिसा एकदा आपल्या बांधवांना म्हणाला, 'इथे ही काशीच आहे!' ते म्हणाले, 'तर मग आज आम्हाला दाखव पाहू!'८४. शिवप्रभूंचे स्मरण केले. लगेच प्रकट होऊन ते म्हणाले, 'तुला काय हवे ते सांग.' तो म्हणाला, 'आज या ठिकाणी चिरंतन काशीची स्थापना करा.'८५.

शंकर परमात्मा 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. त्याच वेळी पाण्यातून एक उत्तम कुंड उद्भवले आणि तिथे क्षणांत विश्वेश्वराची मूर्ती प्रकट झाली.८६. काशीत जी जी चिह्ने आहेत ती सर्व इथे दिसू लागली. ती पाहून त्या शिवभक्ताने आपल्या बंधूंना दाखविली आणि म्हणाला, 'ही काशी! आता तुम्हाला कुठेही जायला नको.'८७.

**प्रत्यब्दं पूजयित्वा नो विठ्ठलं कुलदैवतम् । काशीयात्रात्र कर्तव्या सर्वाघघ्नीप्सितार्थदा ।।८८।।**
**तस्मात्काशीयमित्यस्मिन् गुरौ ब्रुवति तत्क्षणम् । पूर्वाश्रमस्वसा रत्ना-नाम्नी प्राप्य ननाम तम् ।।८९।।**
**तामाह श्रीगुरुः प्रोक्त-स्मृतिस्तेऽस्ति न वा वद । सापि स्मृत्वा तदा स्वाङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह ।।९०।।**
**तां खिन्नां प्रणतां प्राह प्रभुः पापं भवान्तरे । चेद्भोक्ष्यसेऽत्र कुष्ठं द्रागपैत्यंहः प्रयत्नतः ।।९१।।**
**सा प्राह मातृकुक्षौ मे यथेतो न भवेत्स्थितिः । तथैव भवता कार्यं नान्यज्जाने परात्पर ।।९२।।**

'प्रति अब्दं कुल+दैवतं विठ्ठलं पूजयित्वा अत्र सर्व+अघ+घ्नी इप्सित+अर्थ+दा काशी+यात्रा कर्तव्या।'८८। 'तस्मात् इयं काशी' इति अस्मिन् गुरौ ब्रुवति तत्+क्षणम् पूर्व+आश्रम+स्वसा रत्ना+नाम्नी प्राप्य तं ननाम।८९। श्रीगुरुः तां आह। 'ते प्रोक्त+स्मृतिः अस्ति वा न? वद।' सा अपि स्मृत्वा तदा स्व+अङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह।९०। तां खिन्नां प्रणतां प्रभुः प्राह, 'पापं भव+अन्तरे भोक्ष्यसे चेत् कुष्ठं द्राक् अपैति, अंहः प्रयत्नतः (अपैति)।'९१। सा प्राह, 'यथा इतः मे मातृ+कुक्षौ स्थितिः न भवेत् तथा एव भवता कार्यम्। (हे) परात्पर अन्यत् न जाने।'९२।

'दर वर्षी आपल्या कुलदैवताची - विठ्ठलाची पूजा करून पापहारी आणि ईप्सितदायी काशीयात्रा इथे विधिवत् करावी.'८८. 'तेव्हापासून ही काशी झाली,' असे श्रीगुरू बोलतात न बोलतात तोच त्याच क्षणी त्यांची पूर्वाश्रमातील भगिनी रत्नाबाई तिथे आली आणि तिने श्रीगुरूंना नमस्कार केला.८९. श्रीगुरूंनी तिला विचारले, 'मी काय सांगितले ते आठवते ना?' तिला श्रीगुरूंनी, 'तुझा पती संन्यास घेईल आणि शरीरावर कुष्ठ पसरेल' असे सांगितले ते आठवले आणि लगेच तिला आपल्या सर्वांगावर कोड फुटलेले दिसले.९०. तेव्हा रत्नाबाईंनी दुःखित होऊन त्यांना नमस्कार केला. श्रीगुरू तिला म्हणाले, 'हे पाप जर तू पुढच्या जन्मी भोगायला तयार असशील तर कुष्ठ लगेच दूर होऊ शकेल. पापाचा परिहार होण्यासाठी प्रयत्न करावा लागेल.'९१. ती म्हणाली, 'परात्पर सद्गुरो, यापुढे मला पुनः आईच्या गर्भात राहण्याची वेळ येऊ नये असेच आपण करा. मी याउपर कांही जाणत नाही!'९२.

**गुरुः प्राहाघहृत्तीर्थे त्र्यहं स्नानाच्छिवान्तिके । सप्तजन्मार्जितांहोऽपि नश्येत्कुष्ठस्य का कथा ॥९३॥**
**सापि तत्र त्र्यहस्नानाद् भूत्वा कुष्ठोनितामला । मठं निर्माय तत्रैव स्थिता मुक्ता बभूव ह ॥९४॥**
**गुरुस्त्वग्रेऽघहृज्जम्बु-द्वीपस्थाखिलतीर्थवत् । कोटितीर्थं दर्शयित्वा प्राहेदं सफलाघहृत् ॥९५॥**
**क्रान्तिपर्वग्रहेष्वत्र स्नानदानजपादयः । अक्षय्यानन्तफलदा अकुत्सितहृदां नृणाम् ॥९६॥**
**गयावद्रुद्रपादाख्यं तीर्थं त्वग्रे गयोक्तवत् । कृध्वं कर्मात्र कृष्णाग्रे चक्राख्यं द्वार्वतीसमम् ॥९७॥**

गुरुः प्राह, 'शिव+अन्तिके अघ+हृत् तीर्थे त्रि+अहं स्नानात् सप्त+जन्म+अर्जित+अंहः अपि नश्येत्। कुष्ठस्य का कथा?'९३। सा अपि तत्र त्रि+अह+स्नानात् अमला कुष्ठ+ऊनिता भूत्वा मठं निर्माय तत्र एव स्थिता मुक्ता बभूव ह।९४। गुरुः तु अग्रे जम्बु+द्वीप+स्थ+अखिल+तीर्थ+वत् अघ+हृत् कोटि+तीर्थं दर्शयित्वा प्राह, 'इदं सकल+अघ+हृत्।'९५। अत्र क्रान्ति+पर्व+ग्रहेषु स्नान+दान+जप+आदयः अकुत्सित+हृदा नृणां अक्षय्य+अनन्त+फलदाः।९६। अग्रे तु गयावत रुद्र+पाद+आख्यं तीर्थम्। अत्र कर्म कृध्वम्। (तथा) अत्र कृष्ण+अग्रे चक्र+आख्यं द्वार्वतीसमं (तीर्थम्)।९७।

गुरू त्यावर म्हणाले, 'इथे शिवमंदिराजवळ पापनाशी तीर्थ आहे. त्यात तीन दिवस स्नान केल्यावर सात जन्मांचेही पाप नष्ट होते. मग कुष्ठाची काय कथा?'९३. रत्नाबाईने त्याप्रमाणे पापनाशन तीर्थात तीन दिवस स्नान केले. श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे तिचे कुष्ठ पूर्ण मावळले आणि ती शुद्ध झाली. पुढे तिने तिथेच एक मठी बांधली आणि तिथेच राहून अंती मुक्त झाली.९४. श्रीगुरू तिथून पुढे निघाले आणि सर्व लोकांना जम्बुद्वीपातील (भूलोकातील सात द्वीपांतील प्रमुख जम्बुद्वीप आहे. त्यातील मध्यवर्ती भारतवर्ष आणि त्याच्या मधोमध गाणगापूर आहे.) सर्व तीर्थांसमान पापहारी असे कोटितीर्थ दाखविले आणि म्हणाले, 'हे सर्व पापांचा नाश करणारे तीर्थ आहे.'९५. इथे मेषादि संक्रांतीला, पौर्णिमा-अमावस्या-व्यतिपातादि पर्वणींना आणि सूर्य-चंद्रग्रहणात स्नान, दान, जप इत्यादि केल्यास निष्कपट आणि श्रद्धावान भक्तांना अक्षय आणि अनंत फळ मिळते.९६. याच्या पुढे रुद्रपाद नावाचे गयेसारखेच तीर्थ आहे. इथे गयेला जसे सांगितले आहे तसे कर्म करावे. पुढे श्रीकृष्णासमोर चक्र नावाचे तीर्थ आहे. ते द्वारकेसारखे आहे.९७.

**द्वारकोक्तवदाचीर्णात् फलं तस्याश्चतुर्गुणम् । स्नानाज्ज्ञानी भवत्यत्र पतितोऽप्यस्थिचक्रवत् ।।९८।।**
**गोकर्णवद्ग्रामपूर्व-भागः कल्लेश्वरोऽत्र तु । महाबलेशवत्तीर्थं मन्मथाख्यं सुसिद्धिदम् ।।९९।।**
**नभस्यखण्डाभिषेकादूर्जे दीपोत्सवात्स तु । अक्षय्यफलदो दद्यात् सर्वसिद्धियुतामृतम् ।।१००।।**
**एवं शशंसाखिलतीर्थयात्रां । तेऽपि प्रहृष्टाश्च तथैव चेरुः ।**
**एतादृशं क्षेत्रमिदं वरीयो विज्ञाय विज्ञानमयात्मकोऽस्थात् ।।१०१।।**

(अत्र) द्वारका+उक्त+वत्+आचीर्णात् तस्याः चतुः+गुणं फलम्। अत्र स्नानात् पतितः अपि ज्ञानी भवति। अस्थि चक्रवत् च (भवति)।९८। ग्राम+पूर्व+भागः कल्लेश्वरः। अत्र तु महाबलेशवत् मन्मथ+आख्यं सुसिद्धि+दं तीर्थम्।९९। नभसि अखण्ड+अभिषेकात्, ऊर्जे दीप+उत्सवात् तु अक्षय्य+फलदः सर्व+सिद्धि+युत+अमृतं दद्यात्।१००। एवं अखिल+तीर्थ+यात्रां शशंस। ते अपि प्रहृष्टाः तथा एव चेरुः। इदं एतादृशं क्षेत्रं वरीयः विज्ञाय विज्ञान+मय+आत्मकः अस्थात्।१०१।

द्वारकेला सांगितलेला आचार इथे केल्यास द्वारकेच्या चौपट फळ मिळते. इथे स्नान केल्याने पतितही ज्ञानी होतो आणि त्याच्या अस्थी चक्रांकित होतात.९८. गाणगापूरच्या पूर्वभागात कल्लेश्वराचे मंदिर आहे. इथे गोकर्ण महाबळेश्वरासारखे सिद्धिप्रद मन्मथ तीर्थ आहे. इथे श्रावण महिन्यात शंकराला अखंड अभिषेक केल्याने तसेच कार्तिक महिन्यात दीपोत्सव केल्याने सर्व सिद्धी आणि मोक्ष लाभतात.

अशी ही परिपूर्ण तीर्थयात्रा श्रीगुरूंनी त्या लोकांना सांगितली. त्यांनीही आनंदभराने तसेच आचरण केले. असे हे क्षेत्र महान् आहे हे जाणून समस्तज्ञानस्वरूप श्रीगुरू तिथे राहिले.१०१. (पुढच्या अध्यायात) म्लेच्छाचा उद्धार करून भाविकांसाठी कामधेनूच असलेले श्रीगुरू तिथेच राहिलेले आहेत. साक्षात् परमेश्वर असूनही अज्ञानाच्या अंधाराने आंधळ्या झालेल्या जनांना ते दिसत नाही, जसा जन्मांधाला सूर्य दिसत नाही.

**म्लेच्छं समुद्धृत्य ततोऽखिलात्मा तत्र स्थितो भाविककामधेनुः ।**
**प्रत्यक्ष ईशोऽपि न दृश्यतेऽसाववित्तमोऽन्धैररुणो यथान्धैः ।।१०२।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे क्षेत्रमाहात्म्यवर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ।।४।।**

**आदितः द्वाविंशोऽध्यायः ।।**

ततः म्लेच्छं समुद्धृत्य अखिल+आत्मा भाविक+कामधेनुः तत्र स्थितः। असौ प्रत्यक्ष ईशः अपि अवित्+तमः+अन्धैः न दृश्यते, यथा अन्धैः अरुणः।१०२।

मागील श्लोकांत सांगितलेले अमृतत्व (मोक्ष) सापेक्ष (relative) समजावे. कारण ते पुण्याने उत्पन्न होते म्हणजे ते गृहादिकांसारखे नाशिवंतच होय. 'प्रलयानंतरही जे राहते त्या स्थानाला अमृतत्व म्हणतात,' *(आभूतसंप्लवं स्थानममृतत्वममिति भाष्यते)* या विष्णुपुराणाच्या (२:८:९६) व्याख्येनुसार हे आत्यंतिक (absolute) अमृतत्व ठरत नाही. आत्यंतिक अमृतत्व आत्मसाक्षात्कार. ते पुरोडाशाप्रमाणे उत्पाद्य नाही, सोमासारखे विकार्य नाही, मंत्रासारखे प्राप्य (सिद्ध करणे) नाही किंवा साळीसारखे संस्कार्य नाही. 'जीवमात्रांमध्ये स्थित असलेला एकच आत्मा आहे.' *(एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः।)* या ब्रह्मबिंदूपनिषदाच्या(१२) वचनानुसार आत्मा एकमेव, सम आणि अविनाशी आहे. 'सर्वच भूतांमध्ये सारखाच अवस्थित असलेला आत्मा' असे गीतेचेही(१३:२७) वचन आहे. अशा आत्म्याला कसली आशा वा अपेक्षा असूंच शकत नाही. केवळ मिथ्या ज्ञानानेच त्याला अशा आशा-अपेक्षा होऊं शकतात. आकाशाप्रमाणे निष्क्रिय, दुःखाचा संसर्गही नसलेल्या परमानंदस्वरूप आत्म्याला, 'मला दुःख होऊं नये, मला सुख व्हावे,' अशी इच्छा किंवा 'माझे शरीर बलशाली आहे, मी समर्थ आहे' असा अभिमान मिथ्याज्ञानाविना संभवतच नाही. मिथ्याज्ञान असलेल्या आत्म्यालाच, 'मला पत्नी असावी म्हणजे मला संतति होईल, मला संपत्ती मिळावी म्हणजे मी कर्मे करीन' (बृहदारण्यक उपनिषद १:४:१७) असे वाटते. कारण तो स्वतःला यांच्यावांचून अपूर्ण मानतो. जेव्हां

त्याच्या जायादि कोणत्याच बाह्य इच्छा पूर्ण होत नाहीत तेव्हां तीच श्रुति त्याला त्याचे 'मन हाच आत्मा, वाचा हीच जाया, प्राण हीच संतति' इत्यादि संपत्तींचा निर्देश करते. हे अज्ञानाचेच लक्षण आहे. कारण मन इत्यादींविषयी आत्मत्वादि अभिमान अज्ञानांतूनच उगम पावतो. जसा बाह्यकामिनी न मिळालेला पुरुष झोंपेत मनानेच कल्पिलेल्या कामिनीचा उपभोग घेतो तसा स्वर्गादींची इच्छा करणारा यज्ञांचे अनुष्ठान करून स्वप्नतुल्य अशा सातिशय पण अनित्य अशा स्वर्गसुखांत निमग्न होतो. त्याला स्वर्गलोकांतून परत भूलोकांत यावेच लागते. मुंडकोपनिषदांत (१:२:९-१०) सांगितल्याप्रमाणे, 'आसक्तीने कर्म करणाऱ्या लोकांना सत्याचे ज्ञान नसल्याने, त्यांनी कर्मांनी प्राप्त केलेल्या लोकांपासून (त्या कर्माचे फळ संपल्यावर) ढळतात आणि खालच्या लोकांत पडतात. त्या विमूढांना इष्ट आणि पूर्त हेच श्रेष्ठ वाटतात. दुसरे कांही श्रेयस्कर कर्म ते जाणतच नाहीत. आपल्या कर्मांनी कमावलेल्या स्वर्गलोकातील सुखांचा भोग घेऊन ते परत ह्या भूलोकांत येतात किंवा आणखी खालीही जाऊं शकतात.' भगवद्गीतेतही (९:२१) *'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलाकं विशन्ति। '* असे म्हटले आहे.

याप्रमाणे मुमुक्षु जर मंदप्रज्ञ असेल तर त्याला श्रुति स्वर्गसाधनभूत यज्ञांचा उपदेश करते. तो मुमुक्षु जर ज्ञानी असेल तर श्रुति त्याला अध्यात्मयज्ञाच्या अनुष्ठानाचा उपदेश करते. त्याचप्रमाणे काशीला जाण्याला अशक्त असणाऱ्या पण आत्मशुद्धीची इच्छा असणाऱ्यांना त्यांच्या निकटच असलेल्या सर्व तीर्थ आणि देवतांनी युक्त अशा स्थानाला 'हीच काशी' असे सांगून त्या गाणगापूरचे काशीशी असलेले साम्य प्रकट केले. हा झाला वरील तीर्थनिरूपणाचा बाह्य अर्थ.

**तीर्थनिरूपणाचा आंतरिक अर्थ -** कलियुगांतील मंदबुद्धीच्या मानवांना देहांतच विद्यमान असलेल्या संसारांतून तरण्याचे ध्यानादि उपाय (तीर्थे) ठाऊक नाहीत. म्हणून त्यांना जाणवून देण्यासाठी श्रीगुरु त्यांना म्हणाले. ७५. काशी म्हणजे प्रकाशणारे, तेजस्वी म्हणजेच ज्ञान असा अर्थ घेऊन, काशीला जाऊं इच्छिणाऱ्या म्हणजे ज्ञानाची जिज्ञासा,

मुमुक्षा असणाऱ्या लोकांना उद्देशून ते म्हणातात. 'सर्व तीर्थे (ज्ञानाची साधने) इथे ह्या गंधर्वनगरांत - म्हणजेच दृष्टनष्टस्वरूप देहांतच आहेत.' ७६. इडा, पिंगला आणि सुषुम्णा (*इडा भगवती गङ्गा पिंगला यमुना नदी। तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती।।* पद्मपुराण) ह्यांचा संगमभूत हे आज्ञा चक्र हेच प्रयाग आहे. सात्त्विकभावरूपी अष्ट तीर्थे इथे आहेत. सुषुम्णा मार्गावरील मूलाधारादि सहा चक्रे हीच ह्या संगमाचे सहा कांठ आहेत. ही सुषुम्णाच क्रममुक्तीरूप इष्टफल देणारी अमरजा नदी होय. कठोपनिषदांत (२:३:१६) सांगितल्याप्रमाणे 'हृदयांतून जाणाऱ्या शंभर नाड्यांपैकी मस्तकांतून बाहेर पडणारी हीच एक नाडी आहे. तिच्यांतून वर जाणाराच अमृतत्व पावतो.' किंवा त्रिवेणीसंगम म्हणजे 'तत्', 'त्वं' आणि 'असि' ह्या तीन पदांचा योग असणारे महावाक्य असाही अर्थ करतां येतो.७७.जालंधरासुर मनाच्या स्वाभाविक वृत्ती (instincts) आणि त्यांच्या विरुद्ध प्रकाशरूप देव यांच्यांतल्या छांदोग्य उपनिषदांत (१:२:१) वर्णन केलेल्या युद्धांत, *'इंद्रायेन्द्रो परिस्रव'* (ऋग्वेद ८:९१:३) वचनानुसार ईश म्हणजे आत्म्याने, इन्द्र म्हणजे जीवाला दिलेले म्हणजे सहस्रार चक्रांतून स्रवणारे अमृत जाणावे. ७८. स्वरूपाचे विस्मरण (प्रमाद) हाच कालमृत्यु; ज्याच्यामुळे भय होते ते द्वैत हेच **भय** शब्दाने सूचित केले आहे. **अघ** म्हणजे आत्म्याच्या हत्येचे पाप. निर्दोष माणसावर मिथ्यारोप करणे हा त्याची शस्त्रावांचून केलेली हत्याच ठरते. तद्वत् नित्य, शुद्ध बुद्ध आत्मस्वरूपावर पापित्वादि आरोप (अध्यास) ही त्याची हिंसाच होय. *'असुर्या नाम ते लोका'* या ईशावास्योपनिषदाच्या मंत्रावरील भाष्यांत भ.पू.पा. शंकराचार्यांनी असे म्हटले आहे कीं, 'अविद्येच्या दोषाने विद्यमान आत्म्याचा तिरस्कार केल्याने विद्यमान आत्म्याची अजर, अमर इत्यादि लक्षणे जाणीवेतून जातात. एखाद्याला ठार केल्यावर त्याचा प्रभाव नाहीसा होतो तसेच हे आहे. यासाठीच प्राकृत अज्ञानी जीवांकडून आत्म्याच्या हत्येचे पाप घडते.' महाभारतांतही *'किं तेन न कृतं पापं चोरणात्मापहारिणा।'* असे म्हटले आहे. ७९. मनोरथ तीर्थ म्हणजे भक्ति. संतोष हेच संतोषतीर्थ. *रुतं* म्हणजे शोक त्याला *द्रावयति* म्हणजेच पळवतो तो **रुद्र** अर्थात् सात्त्विक अहंकार. नेहमी त्याच्याबरोबरच राहणारा आणि आनंददायी विवेक म्हणजेच **नंदी**.

८०. **शैवी प्रदक्षिणा** याचा अर्थ श्रवण, मनन, निदिध्यासन यांची वरचेवर केलेली आवृत्ती. ८१. **ईश** म्हणजे आत्मा त्याचे दर्शन म्हणजे ' तोच मी आहे' अशी अपरोक्ष अनुभूति. तिच्यामुळे होणारी इष्टप्राप्ती आणि अनिष्टनिवृत्ती वर सांगितलीच आहे. ८२. पुढे ९३ व्या श्लोकापर्यंत सांगितलेला इतिहास विश्वास निर्माण व्हावा यासाठी सांगितला आहे. रत्नाबाईचे कुष्ठ हे जन्ममरणरूपी संसाराचेच रूपक आहे. तिला तीन दिवस स्नान करायला सागितले ज्ञानाभ्यासाचेच उपलक्षण आहे.९४. **कोटितीर्थ** म्हणजेच गीतेत 'या ज्ञानासमान पवित्र या जगांत कांहीच नाही (*न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।)'* असे गौरविलेले विशुद्ध ज्ञान.९५. 'या इथे **संक्रमणं** ह्याचा अर्थ इडा आणि पिंगला यांचे सम्यक् क्रमण. इडेचे क्रमण करून प्राण मूलाधाराशीं आला कीं चंद्रग्रहण, पिंगलेंतून मूलाधारांत प्राण आला कीं सूर्यग्रहण, इडा-पिंगलांच्या संधीला (आज्ञाचक्र) प्राण पोंचला कीं अमावास्या, इडेंतून प्राण पिंगलेंत जाणे दक्षिणायन व पिंगलेंतून इडेंत प्राणाचे गमन हे उत्तरायण असे सूतसंहितेंत वर्णन आहे. त्याचा दाखला श्रीस्वामीमहाराजांनी टीकेंत पुढे दिला आहे.९६. उदरालंबन म्हणजे नाभीजवळचे मणिपूर चक्र हीच **गया.** पांच छिद्रांचे हृत्कमल (अनाहत चक्र) हीच द्वारका. कारण तिथेच श्रीकृष्णपरमात्म्याचे वास्तव्य आहे.९७-९८. सुसिद्धिदं (उत्तम सिद्धि देणारे) मन्मथक्षेत्र म्हणजेच ब्रह्मरंध्र (सहस्रार चक्र होय). किंवा अनाहताला **मन्मथ क्षेत्र** आणि ब्रह्मरंध्राला द्वारका असा व्यत्यास केला तरी चालेल. आत्मपुराणांत म्हटले आहे, *'स देवदेवजनकः कपालत्रयमध्यमां। सिमंतिनीनां सीमंते सीमांता विदितां नृणाम्। ततो मनुष्यमात्रस्य पुरा द्वारवती स्मृता। अस्यां यस्मादयं कृष्णः पुराणपुरुषोऽविशत्। ऊर्ध्वभागे ततो द्वारं विद्वद्भिः कीर्त्यते बुधैः।।'* 'तीन कपाळांच्या मध्यभागी स्त्रियांच्या भांगाजवळच्या सीमेला मनुष्यमात्रांची द्वारवती (द्वारका) आहे. त्याच्या वरच्या भागीं ज्ञानी लोकांनी वर्णन केलेले द्वार (ब्रह्मरंध्र) आहे. तो देवदेवांचा (ब्रह्मदेवाचा) पिता, जीवभूत श्रीकृष्णपरमात्मा या ब्रह्मरंध्रांचा भेद करूनच देहामध्यें प्रवेश करतो. त्यामुळे हीच मनुष्यमात्रांची द्वारका होय'१००. असे सर्व नरदेहाचे माहात्म्य श्रीगुरूंनी सांगितल्याने आणि मोक्षमार्गाची सुगमता कळाल्याने ते लोक आनंदित झाले.

हे क्षेत्र, म्हणजे गंधर्वनामक हा देह, श्रेष्ठ आहे. विज्ञान म्हणजे बुद्धी ज्याची उपाधि आहे असे आत्मस्वरूप तिथे अवस्थित आहे. १०१. इथे असा प्रश्न उपस्थित केला जाऊं शकतो की *'द्वा सुपर्णा'* (ऋग्वेद १:१६४:२०) या श्रुतींत दोघांचे अस्तित्व प्रतिपादले असतांना इथे एकाचाच निर्देश कसा केला? त्याचा खुलासा प्रस्तुत श्लोकांत केला आहे. तो अखिलात्मा असूनही प्रतिबिंबरूप असल्याने उपाधीच्या मालिन्याने म्लेच्छ म्हणजे अस्पष्ट उच्चार करणारा - अस्पष्ट आविष्कृत होणारा चिदाभास, त्याचा उद्धार करून शुद्ध आत्मस्वरूपच हार्दाकाशांत स्थिरावले असा आशय आहे. १०२.

प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा चौथा आणि प्रथमपासून बाविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## || अथ त्रयोविंशोऽध्यायः ||

**|| नामधारक उवाच ||**

**साधु साधूदितं क्षेत्र-माहात्म्यं लोकपावनम् । जगन्निवासो भगवान् यत्रोवासैष लीलया ||१||**
**तत्र तत्राखिला देवा ऋषियोगिमुनीश्वराः । निवसन्ति पुनस्तत्र ननु तीर्थानि सर्वशः ||२||**
**कृष्णापञ्चनदीयोगो धन्योऽन्योऽप्येष तादृशः । स भीमामरजायोगः साक्षात्तु भगवानिह ||३||**
**पशुपक्षिमृगा मीनास् तत्रत्याः स्नानपानतः । धन्या एव पुनर्नॄणां धन्यत्वं किमु वर्ण्यते ||४||**

नामधारक उवाच। लोक+पावनं क्षेत्र+माहात्म्यं साधु साधु उदितम्। एष जगत्+निवासः भगवान् यत्र लीलया उवास।१। तत्र तत्र अखिलाः देवा++ऋषि+योगि+मुनि+ईश्वराः निवसन्ति। पुनः तत्र सर्वशः तीर्थानि (अपि निवसन्ति)।२। कृष्णा+पञ्चनदी+योगः धन्यः। अन्यः अपि तादृशः एष भीमा+अमरजा+योगः सः भगवान् तु इह साक्षात् (वर्तते)।३। तत्रत्याः पशु+पक्षि+मृगा+मीनाः स्नान+पानतः धन्याः एव। पुनः नृणां धन्यत्वं किम् उ वर्ण्यते?४।

श्रीगणेशाय नमः। *तेविसाव्यांत म्लेच्छ राजाचा करूनि उद्धार। अदृश्य झाला अभक्तांना, परि प्रत्यक्ष आजही भक्तांना।।२३।।* श्रीगुरू उगी राहिलेले पाहून नामधारक दहा श्लोकांत त्यांना विचारीत आहे. 'छान छान! सर्व जनांना पावन करणारे क्षेत्रमाहात्म्य आपण फार उत्तम सांगितलेत. हा जगन्निवास भगवंत लीलेने जिथे जिथे निवास करतो,(१) तिथे तिथे सर्व देव, ऋषी, मुनी राहतात. त्यांच्याबरोबरच साहजिकच सर्व तीर्थेही तिथे येतात.२. कृष्णा आणि पञ्चगंगा यांचा संगमही श्रीगुरूंच्या निवासाने धन्य झाला आहे. तसाच हा दुसरा भीमा आणि अमरजा यांचा संगम भगवंताच्या साक्षात् वास्तव्याने धन्य झाला आहे.३. या संगमाच्या जलात स्नान करून आणि ते पिऊन येथील पशू, पक्षी आणि जलचरही धन्य झाले आहेत. मग येथील मानवांची धन्यता किती म्हणून वानावी?४.

**यन्माहात्म्यश्रवणतो लीयन्ते पापराशयः । किं पुनस्तन्निवसतां सतां वाच्या हि सद्गतिः ।।५।।**
**भगवद्भक्तियुक्ता ये मुक्तिस्तेषां करे स्थिता । मुक्तिं ते परिभाव्यातो भक्तिमेवाश्रयन्त्यरम् ।।६।।**
**मुक्त्यपेक्षा पुराभून्मे सा भवत्कृतबोधतः । व्यपेता दूरतो वृद्धाहैतुकीभक्तियोगतः ।।७।।**
**अतः प्रियतमं विष्णोः कीर्तनश्रवणादिकं । तद्गुणश्रवणं श्राव्यं रोचते मे विशेषतः ।।८।।**
**तस्मात्स्वर्गायचरित-पूरितात्मन्वदस्व मे । श्रीगुरोश्चरितं रम्यं मङ्गलं पावनं परम् ।।९।।**
**को म्लेच्छः सोऽतिहीनोऽपि कृपापात्रं परात्मनः । कथं जातो हि भवता यत्तूक्तं म्लेच्छ उद्धृतः ।।१०।।**

यत्+माहात्म्यं श्रवणतः पाप+राशयः लीयन्ते तत्+निवसतां सतां सद्गतिः हि किं पुनः वाच्यते?५। 'ये भगवत्+भक्ति+युक्ता मुक्तिः तेषां करे स्थिता। अतः ते मुक्तिं परिभाव्य अरं भक्तिं एव आश्रयन्ति।६। पुरा मे मुक्ति+अपेक्षा अभूत्। सा भवत्+कृत+बोधतः अहैतुकी+भक्ति+योगतः दूरतः व्यपेता।७। अतः विष्णोः कीर्तन+श्रवण+आदिकं प्रियतमम्। तत्+गुण+श्रवणं मे विशेषतः रोचते।८। तस्मात् (हे) स्वर्गाय+चरित+पूरित+आत्मन्, मे श्रीगुरोः रम्यं, मङ्गलं पावनं परं चरितं वदस्व।९। कः सः म्लेच्छः? अति+हीनः अपि पर+आत्मनः कृपा+पात्रं जातः? यत् हि भवता उक्तं 'म्लेच्छ उद्धृतः।'१०।

ज्या गाणगापूर क्षेत्राचे माहात्म्य कानांवर पडल्यानेही पापांच्या राशी नष्ट होतात तिथे राहणाऱ्या सज्जनांच्या सद्गतीविषयी कितीही वर्णन केले तरी अपुरेच ठरणार आहे.'५. 'भगवंताची भक्ती ज्यांना लाभली आहे त्यांना मुक्ती करतलावरच असते. म्हणून ते मुक्तीचा अनादर करून भक्तीचाच आश्रय करतात.६. मलाही पूर्वी मुक्तीची अपेक्षा होती. पण आपण केलेल्या उपदेशाने ही अहैतुकी भक्ती प्राप्त झाल्याने मुक्तीची इच्छा दूर झाली.७. आता मला सर्वव्यापी श्रीगुरूंचे कीर्तन, श्रवण, अर्चन इत्यादि अत्यंत प्रिय वाटतात. विशेषतः त्यांच्या गुणांचे श्रवण मला फारच आवडते!८. त्याकरिता स्वर्गातही गायल्या जाणाऱ्या गुरुचरित्राने ज्यांची बुद्धी संपृक्त झाली आहे अशा सिद्धमुने, मला श्रीगुरूंचे रम्य, मंगल आणि पावन चरित्र सांगा.९. तो म्लेच्छ कोण जो श्रीगुरुपरमात्म्याच्या कृपेला पात्र झाला? कारण आपण म्हणत होता की एका म्लेच्छाचा श्रीगुरूंनी उद्धार केला!'१०.

## ।। सिद्ध उवाच ।।

**धन्योऽसि तेऽद्य भगवत्प्रसादान्मतिरीदृशी । अतस्तच्चरितं वक्तुमानन्दोऽतीव वर्धते ।।११।।**
**यदा स्थितः कुरुपुरे प्रत्यक्षं श्रीपदस्तदा । रजकः प्रत्यहं भेजे तं स्तोत्रैर्नतिभिः सदा ।।१२।।**
**कदाचिदाह तं तुष्टः श्रीपादो भाविकोऽसि रे । कुर्वकण्टकसाम्राज्यं तच्छ्रुत्वा सोऽतिहर्षितः ।।१३।।**
**सोऽलङ्कृतं नृपं नद्यां क्रीडन्तं युवतीयुतम् । चतुरङ्गबलोपेतं दृष्ट्वा स्वगतमब्रवीत् ।।१४।।**

सिद्ध उवाच। धन्यः असि! अद्य भगवत्+प्रसादात् ते ईदृशी मतिः। अतः तत्+चरितं वक्तुं आनन्दः अतीव वर्धते।११। यदा कुरुपुरे प्रत्यक्षः श्रीपदः स्थितः तदा रजकः तं प्रति+अहं सदा स्तोत्रैः नतिभिः भेजे।१२। कदाचित् तुष्टः श्रीपदः तं आह, 'रे, भाविकः असि। अकण्टकं साम्राज्यं कुरु!' तत् श्रुत्वा सः अति+हर्षितः।१३। सः नद्यां क्रीडन्तं अलङ्कृतं युवतीयुतं चतुः+अंग+बल+उपेतं नृपं दृष्ट्वा स्व+गतं अब्रवीत्।१४।

वरच्या श्लोकांतले **स्वर्गाय** पद वेगळे काढून स्वर्गासाठी - कर्मनिष्ठांसाठी स्वर्गप्राप्ती आणि मुमुक्षूसाठी (सु+अर्ग) चांगल्या ज्ञानप्राप्तीसाठी जे गाइले जाते असा दुहेरी अर्थ करता येतो.

सिद्धमुनी उत्तरले, 'धन्य आहेस! आज भगवंताच्या प्रसादानेच तुला अशी बुद्धी झाली आहे. त्यामुळे त्या श्रीगुरूंचे चरित्र सांगण्याला मला अतीव आनंद वाटतो आहे.'११. श्रीगुरू (सातव्या अध्यायात सांगितलेल्या) कुरुगड्डीला असताना एक परीट प्रतिदिन सदा श्रीगुरूंची नमस्कार आणि स्तोत्र यांसह सेवा करीत असे.१२. त्या सेवेने संतुष्ट झालेले श्रीगुरू एकदा त्याला म्हणाले, 'अरे रजका, तू भाविक आहेस! तू अकंटक (शत्रूरहित) साम्राज्याचा अधिपती होशील!' ते ऐकून त्याला खूप आनंद वाटला.१३. त्याने एकदा एक वस्त्रे आणि भूषणे यांनी सजलेला यवन राजा नदीत क्रीडेला आलेला पाहिला. त्याच्याबरोबर अनेक तरुण स्त्रिया, चतुरंग सेना इत्यादि राजपरिवारही होता.१४.

**गुरुः कोऽस्य कुतस्त्वीदृग्-भाग्यं तज्जीवितं वरम् । क्व वार्तास्य मयीत्येतज्-ज्ञात्वा श्रीपाद आह तम् ।।१५।।**
**ज्ञातं ते हृद्गतं त्वत्र जरन्नार्होऽसि जन्मनि । राज्यं भोक्तुमतो भुङ्क्ष्व जन्मन्येष्येऽर्पितं ध्रुवम् ।।१६।।**
**सम्मतं भवदुक्तं हि यूनो राज्यरसज्ञता । राज्येऽप्यस्तु स्मृतिस्ते म इति तं स स्म याचते ।।१७।।**
**श्रीपादोऽपि तथेत्यूचे प्रेत्यापि रजकस्ततः । वैडूर्यनगरे म्लेच्छः सार्वभौमोऽभवन्नृपः ।।१८।।**

'अस्य गुरुः कः? कुतः ईदृक् भाग्यम्? तत् जीवितं वरम्! मयि अस्य क्व वार्ता?' एतत् ज्ञात्वा श्रीपाद तं आह।१५। 'ते हृत्+गतं ज्ञातम्। अत्र जन्मनि जरन् राज्यं भोक्तुं अर्हः न असि। अतः एष्ये जन्मनि ध्रुवं (राज्यं) अर्पितम्। भुंक्ष्व।'१६। 'भवत्+उक्तं संमतं हि। यूनः राज्य+रस+ज्ञता। राज्ये अपि मे ते स्मृतिः अस्तु,' इति सः तं याचते स्म।१७। श्रीपादः अपि 'तथा' इति ऊचे। ततः रजकः अपि प्रेत्य वैडूर्यनगरे सार्वभौमः म्लेच्छः नृपः अभवन्।१८।

त्या राजाला पाहून त्याच्या मनात विचार आला, 'कोण ह्या राजाचा गुरू असेल? कसे त्याला एवढे ऐश्वर्य मिळाले असेल? त्याचे जीवन हे खरे जीवन आहे! माझ्यासारख्याला अशा भाग्याची वार्ता तरी कुठली?' त्याच्या मनातील हे विचार श्रीपादप्रभूंनी ओळखले आणि त्याला म्हणाले.१५.

'तुझ्या मनातली वासना मी जाणली आहे. या जन्मात आता तू वृद्ध झाला आहेस. हे वय राज्य भोगण्याला योग्य नाही. तेव्हा तुला पुढच्या जन्मात निश्चयपूर्वक राज्य दिले. ते तू सुखाने भोग!'१६. 'आपले म्हणणे मान्य आहे, महाराज! बालपणी रसचंदनादि भोगांचे अज्ञान असते तर म्हातारपणी ते ज्ञान असूनही ते भोगण्याची शक्ती नसते. त्यामुळे ते सर्व राज्यभोग तारुण्यातच सुखकारक असतात. मात्र त्या राज्यातही मला आपली स्मृती असावी हीच प्रार्थना आहे.' अशी त्याने याचना केली.१७. श्रीपादांनीही 'तथास्तु' म्हणून आशीर्वाद दिला. त्यानंतर थोड्याच काळात तो परीट भक्त मृत्यू पावला आणि त्याचा जन्म बिदर येथे राजघराण्यात झाला. श्रीगुरूंच्या आशीर्वादानुसार तो सार्वभौम यवन राजा झाला.१८.

**म्लेच्छधर्मारुचिः पूर्व-संस्काराद्देवविप्रभाक् । शुद्धात्मा दानधर्मज्ञः सर्वभूतसमोऽभवत् ।।१९।।**
**तं तत्पुरोहिता ऊचुः स्वधर्मं सेवयोत्तमम् । मृषोद्यवर्णधर्मोऽयमग्राह्यो मनसाप्यसन् ।।२०।।**
**मुखाद्यावयवैर्देह-साम्ये वर्णक्रमः कथम् । अचेतनोपलेध्मादौ देवतान्यत्र वा कथम् ।।२१।।**
**राजा तानाह धीमान्द्यमिदं सृष्टं परात्मना । गुणकर्मभिदा चातुर्वर्ण्यं देवस्तु सर्वगः ।।२२।।**

पूर्व+संस्कारात् म्लेच्छ+धर्म+अरुचिः देव+विप्र+भाक् शुद्ध+आत्मा दान+धर्म+ज्ञः सर्व+भूत+समः अभवत्।१९। तं तत्+पुरोहिताः ऊचुः। उत्तमं स्वधर्मं सेवय। अयं वर्ण+धर्मः मृषा+उद्यः मनसा अपि अग्राह्यः असन्।२०। मुखा+आदि+अवयवैः देह+साम्ये वर्ण+क्रमः कथम्? अचेतन+उपल+इध्म+आदौ अन्यत्र वा देवता कथम्?२१। राजा तान् आहे, 'इदं धी+मान्द्यम्! पर+आत्मना गुण+कर्म+भिदा चातुः+वर्ण्यं सृष्टम्। देवः तु सर्वगः।'२२।

बृहदारण्यक उपनिषदात (४:४:२) सांगितल्याप्रमाणे पहिल्या जन्मातील ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन तो जन्माला आला होता. पूर्वजन्मीच्या संस्कारांनी त्याला यावनी धर्माची आवड नव्हती. देवाब्राह्मणांचा तो आदर करीत असे. तो शुद्ध बुद्धीचा, दानधर्माची जाण असलेला, सर्व जीवमात्रात समभाव बाळगणारा असा झाला.१९. त्याला त्याच्या धर्मगुरूंनी सांगावे, 'राजेसाहेब, आपण आपला ह्या उत्तम यवनधर्माचे पालन करावे. हा जो वर्णाश्रमधर्म आहे तो मिथ्या आहे असे आपले धर्मशास्त्र सांगते. तो धर्म मनातही आणू नये इतका वाईट आहे.'२०. ते यावनी पुरोहित पुढे सांगतात, 'तोंड, हात, पाय इत्यादि अवयव सारखेच असताना हा ब्राह्मण, हा क्षत्रिय असे वर्णभेद कसे करतात? गाय, घोडे इत्यादि प्राण्यात त्यांच्या अवयवांवरून, आवाजावरून, त्यांच्या मलाच्या वेगळेपणावरून जसा भेद करता येतो किंवा स्त्री आणि पुरुषांतही योनी, लिंग आदींवरून फरक दिसतो तसा वर्णांमध्ये करता येत नाही. दगड, लाकूड, माती, सोने इत्यादि अचेतन वस्तूंच्या प्रतिमांत तसेच पाणी, अग्नी यांच्यात देवत्व कसे येईल?'२१. राजा त्यांचे म्हणणे खोडून टाकीत म्हणतो, 'हे तुमच्या बुद्धीचे मांद्य आहे. त्यांच्या धर्मग्रंथांत (भ.गीता ४:१३) सांगितल्याप्रमाणे हे चार वर्ण सत्त्व-रज-तम आदि गुणांच्या आणि शमदमादि कर्मांच्या विभागणीने (भ.गीता १८:४२-४४) परमेश्वरानेच केलेले आहेत. आणि देव तर सर्वव्यापी आहे असे तुम्हालाही मान्य आहेच ना? या संपूर्ण जगाचे अधिष्ठान परमात्माच आहे तेव्हा तो चेतन अचेतन अशा सर्वच वस्तूंत आहेच.२२.

**स्थूलाक्षराल्लिपिज्ञानं शिशोरिव परात्मनः । गुरूक्तार्चाकल्पनया हृत्स्थैर्याद्बोध उद्भवेत् ।।२३।।**
**सतोम्ब्वाद्येऽपि बिम्बस्य प्रतीतिर्न मलान्विते । तथात्मनो न मलिने प्रतीतिः सा तु निर्मले ।।२४।।**
**तत्स्वप्रमानादिवेद-प्रोक्तधर्मपरान् द्विजान् । नमस्कुरुत भक्त्या ते देवानामपि देवताः ।।२५।।**
**वेदानुसारिस्मृत्युक्त-धर्मकर्मानुवर्तिनः । पूज्या अतो द्वेषशङ्कां त्यजतेत्याह तान्नृपः ।।२६।।**
**ततः कालेन कियता स्फोटकोऽङ्के समुत्थितः । तेन राड् व्यथितोऽत्यन्तं मोघाभूत्तत्प्रतिक्रिया ।।२७।।**

शिशोः स्थूल+अक्षरात् लिपि+ज्ञानं इव गुरु+उक्त+अर्चा+कल्पनया हृत्+स्थैर्यात् पर+आत्मनः बोध उद्भवेत्।२३। सतः अम्बु+आद्ये बिम्बस्य प्रतीतिः, न मला+अन्विते। तथा आत्मनः मलिने न प्रतीतिः सा तु निर्मले।२४। तत् स्व+प्रम+अन+आदि+वेद+प्रोक्त+धर्म+परान् द्विजान् भक्त्या नमस्कुरुत। ते देवानां अपि देवताः।२५। 'वेद+अनुसारी+स्मृति+उक्त+धर्म+कर्म+अनुवर्तिनः पूज्याः। अतः द्वेष+शंकां त्यजत'इति नृपः तान् आह।२६। ततः कियता कालेन अङ्के स्फोटकः समुत्थितः। तेन राट् अत्यंतं व्यथितः। तत्+प्रतिक्रिया मोघा अभूत्।२७।

मूर्तिपूजेविषयी विचाराल तर लहान मुलांना जशी मोठी अक्षरे शिकवून मग सूक्ष्म लिपीचे ज्ञान करून देतात तसेच गुरूंनी सांगितलेल्या किंवा परंपरेने आलेल्या मूर्तीच्या चिंतनाने मन स्थिर झाल्यावर निराकार परमेश्वराचे ज्ञान होते.२३. पाणी असो वा आरसा असो, स्वच्छ असेल तरच त्यांत आपल्या मुखाचे वगैरे प्रतिबिंब चांगले दिसते. ते मलीन असेल तर तसे दिसणार नाही. त्याचप्रमाणे रागद्वेषादि दोषांनी चित्त मलीन असेल तरच अंतरात्म्याची प्रचीती येते.२४. हे सर्व ज्ञान ज्या वेदांत सांगितले आहे ते स्वतःप्रमाण आणि अनादि आहेत. अशा वेदांत सांगिलेल्या धर्माचे अनुसरण करणाऱ्या ब्राह्मणांना भक्तीपूर्वक नमस्कार करावा. ते देवांचेसुद्धां देव आहेत.' २५. 'वेदांनाच अनुसरणाऱ्या स्मृतींनी ग्रथित केलेल्या धर्मांचे आणि कर्मांचे अनुशीलन करणाऱ्यांचा आदरच केला पाहिजे. तरी तुम्ही त्यांचा द्वेष करू नका.' असे राजाने त्या पुरोहितांना समजावले.२६. पुढे कांही काळ गेल्यावर राजाच्या मांडीवर एक मोठा फोड झाला. त्याने राजा अगदी त्रासून गेला. त्याच्यावरे कांहीच उपाय चालेनात.२७.

**राजा यातनया त्यक्त-भुक्तिसुप्तिरतिर्द्विजम् । आहूय तत्प्रतीकारं पप्रच्छ विनयान्वितः ।।२८।।**
**स प्राह नात्र वक्तव्यं भवान्म्लेच्छो द्विजोऽस्म्यहम् । जनश्रुतिभियैकान्ते वक्तव्यं भूपसत्तमम् ।।२९।।**
**अथापतुरुभौ पाप-नाशतीर्थं द्विजोऽब्रवीत् । भो पूर्वार्जितदुष्कर्म-योगाद्रोगसमुद्भवः ।।३०।।**

यातनया त्यक्त+भुक्ति+सुप्ति+रतिः राजा द्विजं आहूय विनय+अन्वितः तत्+प्रतीकारं पप्रच्छ।२८। सः प्राह, '(हे) भूप+सत्तम, भवान् म्लेच्छः, अहं द्विजः अस्मि। अत्र न वक्तव्यम्। जन+श्रुति+भिया एकांते वक्तव्यम्।' २९। अथ उभौ पाप+नाश+तीर्थं आपतुः। द्विजः अब्रवीत्, 'भो (राजन्) पूर्व+अर्जित+दुः+कर्मात् रोग+समुद्भवः।'३०।

त्या फोडाच्या वेदनांनी राजाला खाणे-पिणे, झोप किंवा कामसेवन सुचेनात. तेव्हा त्या राजाने एका ब्राह्मणाला बोलावून त्या फोडावर उपाय विचारले.२८. तो ब्राह्मण त्याला म्हणाला, 'राजेसाहेब, आपण यवन जातीचे आहात आणि मी तर ब्राह्मण आहे. इथे आपण बोललो तर त्याचा उगीच बोभाटा होईल. तेव्हा आपण एकांतात कुठे तरी जाऊन बोलू या.'२९.

**जन्मांतराने कर्माचा भोग -** राजाला त्याचे म्हणणे पटले आणि ते दोघेही बिदरजवळच्या पापनाशी तीर्थाला गेले. तो ब्राह्मण सांगू लागला, 'माणसाला जे कांही रोग होतात ते पूर्वजन्मींच्या पापकर्मामुळेच होतात.' एका जन्मात केलेली दुष्कर्मे दुसऱ्या जन्मातल्या रोगांचे कारण कसे होतात? अशी शंका घ्यायचे कारण नाही. मृत्यू याचा अर्थ पाचभौतिक देहातून जीवाचे निष्क्रमण. देहापासून जीव वेगळा होतो. देह जरी महाभूतात विलीन झाला तरी आत राहणारा पुरुष तसाच राहतो. जोपर्यंत आत्मज्ञान होत नाही तोपर्यंत तो पुनःपुनः जन्मतो आणि मरण पावतो. छांदोग्य उपनिषदानसार 'त्याची वाचा मनात मिळून जाते, मन प्राणात, प्राण तेजात आणि तेज परदेवतेत मिळून जातात.' वर उद्धृत केलेल्या बृहदारण्यक उपनिषदाच्या मंत्राप्रमाणे '*जीव बाहेर पडला की सर्व प्राण त्याच्यामागे जातात. तो त्याचे ज्ञान, कर्म आणि प्रज्ञा घेऊन जातो.*' प्रश्नोपनिषदांत सांगितले आहे, (हृदयातील एकशे एक नाड्यांपैकी) एका वर जाणाऱ्या नाडीतून..

**दानभेषजसत्तीर्थ-देवसेवादिभिर्भवेत् । तच्छान्तिः साधुदृष्ट्यापि सर्वाघहृतिदक्षया ।।३१।।**
**पुरावन्तीपुरे धर्म-हीनोऽभूद्ब्राह्मणब्रुवः । त्यक्तकर्मा पिङ्गलाख्य-वेश्यासक्तो मदोद्धतः ।।३२।।**

तत्+शान्तिः दान+भेषज+सत्+तीर्थ+देव+सेवादिभिः भवेत्। सर्व+अघ+हृति+दक्षया साधु+दृष्ट्या अपि (तत्+शांतिः भवेत्)। पुरा अवन्तीपुरे धर्म+हीनः त्यक्त+कर्मा पिङ्गला+आख्य+वेश्या+सक्तः मद+उद्धतः ब्राह्मण+ब्रुवः अभूत्।३२।

.. उदान (नावाचा प्राण) पुण्य अधिक असेल तर पुण्यलोकांना नेतो, पाप अधिक असेल तर पापलोकांना नेतो आणि दोन्ही समान असतील तर मनुष्यलोकाला. प्राण तेजासह आत्म्याला यथासंकल्पित लोकाला नेतो.' कठोपनिषदातही (२:२:७) असेच प्रतिपादन आहे. 'आपापल्या कर्मानुसार आणि शास्त्राध्ययनानुसार जीव त्या त्या योनी पावतात.' या सर्व आगमप्रमाणांवरून कर्माचे फल देणाऱ्या ईश्वराच्या प्रेरणेने जन्मांतराचे पापच रोगादि दुःखांचे कारण आहे.३०. 'त्या रोगांचे उपशमन करण्याचे उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. **१. दान -** श्रद्धेने सत्पात्री (योग्य व्यक्तीला) केलेला धनत्याग; **२. भेषज -** आयुर्वेदात सांगितलेले औषध; **३. सत्** साधुसंत, **तीर्थ** गंगादि तीर्थस्थाने आणि **देव** विष्णू, शंकर इत्यादि यांच्या सेवेने; आदि शब्दाने जप, होम इत्यादि घ्यावेत. **४.** शेवटी सर्व पापांचे निवारण करणाऱ्या साधूच्या केवळ कृपाकटाक्षानेही रोगाची शांती होते.'३१. साधूची नुसती दृष्टी जरी पडली तर रोग कसा बरा होतो याविषयी एक आख्यान तो ब्राह्मण राजाला सांगत आहे. पूर्वी उज्जयनी नगरीत एक केवळ नामधारी ब्राह्मण राहत होता. त्याने सर्व धर्म-कर्म यांचा त्याग केला होता. पिंगला नावाच्या वेश्येत त्याचे मन अडकले होते. तो तिच्यासहच राहत असे. पैशाच्या मदाने तो उद्धट झाला होता.३२.

**तत्प्राक्पुण्यचयाद्योगी ऋषभः प्राप तत्र तौ । सेवयामासतुः प्रेम्णा पादसंवाहनादिभिः ॥३३॥**
**स्तुतोऽर्चितो भोजितोऽनु पर्यङ्के शायितोऽमले । पीततत्पादतीर्थाभ्यां तुष्टः सुष्वाप वीजितः ॥३४॥**
**सुप्तोऽपि नमितः प्रातरुत्थायागात्स संस्तुतः । इयत्पुण्येन तौ प्रेत्य जातौ ब्रह्मकुलेऽमले ॥३५॥**
**वज्रबाहोर्दशार्णेशो महिष्याः कुक्षिमाप सः । तत्सपत्नी तदा द्वेषाद् गर्भिण्यै गरलं ददौ ॥३६॥**

तत्+प्राक्+पुण्य+चयात् ऋषभः योगी तत्र प्राप। तौ प्रेम्णा पाद+संवाहनादिभिः सेवयामासतुः।३३। पीत+तत्+पाद+तीर्थाभ्यां स्तुतः अर्चितः भोजितः अनु अमले पर्यंके शायितः तुष्टः।३४। सुप्तः अपि नमितः। प्रातः उत्थाय सः संस्तुतः अगात्। इयत् पुण्येन तौ प्रेत्य अमले ब्रह्म+कुले जातौ।३५। सः दशार्ण+ईशः वज्रबाहोः महिष्याः कुक्षिं आप। तदा तत्+सपत्नी द्वेषात् गर्भिण्यै गरलं ददौ।३६।

त्याच्या कांही पूर्वपुण्याईने तिथे एकदा महान योगी ऋषभदेव आले. त्या ब्राह्मणाने आणि त्या वेश्येने मिळून त्यांची प्रेमाने, पाय चेपून वगैरे सेवा केली.३३. त्यांच्या पायाचे तीर्थ घेतले. त्यांची गोड शब्दांनी स्तुती केली; पूजा केली; त्यांना जेवायला घातले; आणि चांगल्या पलंगावर त्यांची झोपायची सोय केली; त्यांना पंख्याने वारा घातला. अशा रीतीने त्यांनी त्या मुनींना प्रसन्न केले.३४. ते झोपल्यावरही त्यांनी जागून त्यांची झोपमोड होऊ दिली नाही. ते उठल्यावर त्यांना नमस्कार करून त्यांची स्तुती केली. त्यानंतर ते ऋषभदेव आले तसे आपल्या वाटेने निघून गेले. त्या ऋषिसेवेच्या पुण्याईने ते दोघेही मृत्यूनंतर शुद्ध राजकुलात जन्माला आले.३५. ती वेश्या दशार्ण देशाचा राजा वज्रबाहू याची पट्टराणी झाली आणि तो ब्राह्मण तिच्या पोटी आला. तेव्हा तिच्या सवतीने मत्सराने त्या गरोदर राणीला विष घातले.३६.

**तेन विद्धापि न मृता दैवात्सा सुषुवे सुतम् । बालोऽपि विषविद्धोऽभूदुभौ जातौ व्रणाङ्कितौ ।।३७।।**
**तदार्तिर्न शशामापि नानोपायैरुभौ सदा । क्रन्दमानौ निराहार-निद्रौ क्षीणौ तु कृच्छ्रतः ।।३८।।**
**राजैकदा पूतिगन्धि-त्रस्तस्तद्वीक्षणात् क्षणात् । सूतमाज्ञाप्य सार्भां तां गमयामास कानने ।।३९।।**
**घोरेऽरण्येऽपि तौ त्यक्त्वा राज्ञे सूतः शशंस तत् । ततो रेमेऽन्यभोगिन्या क्रूरो राजातिहृष्टया ।।४०।।**
**घोरसत्त्वे वने राज्ञी विजने व्रणकर्शिता । अज्ञाताङ्घ्रिगतिस्तन्वी त्रस्ताभूत्कण्टकोपलैः ।।४१।।**

(सा) तेन विद्धा अपि न मृता। सा दैवात् सुतं सुषुवे। बालः अपि विष+विद्धः अभूत्। उभौ व्रण+अङ्कितौ जातौ।३७। तत्+आर्तिः नाना+उपायैः अपि न शशाम। उभौ सदा क्रंदमानौ निः+आहार+निद्रौ कृच्छ्रतः तु क्षीणौ।३८। एकदा राजा तत्+वीक्षणात् पूति+गन्ध+त्रस्तः क्षणात् सूतं आज्ञाप्य तां स+अर्भां कानने गमयामास।३९। सूतः अपि तौ घोरे अरण्ये त्यक्त्वा राज्ञे शशंस। ततः क्रूरः राजा अति+हृष्टया अन्य+भोगिन्या रेमे।४०। घोर+सत्त्वे विजने वने व्रण+कर्शिता अ+ज्ञात+अङ्घ्रि+गतिः तन्वी राज्ञी कण्टक+उपलैः त्रस्ता अभूत्।४१।

पण त्या राणीला त्या विषाची बाधा झाली तरी तिचा मृत्यू झाला नाही. तिच्या सुदैवाने तिने मुलाला जन्म दिला. त्या मुलालाही ते विष बाधले. त्यामुळे दोघांनाही सर्वांगावर व्रण झाले.३७. त्यांच्या त्या रोगावर अनेक उपाय करूनही तो शमला नाही. दोघेही सारखे दुःखाने आक्रोश करायचे. त्यांना न धड आहार ना धड झोप मिळत होती. त्या कष्टांनी ते अगदी क्षीण होऊन गेले.३८. एकदा त्यांची ती अवस्था पाहून आणि त्यांच्या पू आणि दुर्गंधाला विटून राजाने आपल्या सारथ्याला त्यांना तत्काळ अरण्यात सोडून यायची आज्ञा केली.३९. त्याप्रमाणे त्या सारथ्यानेही त्याना रथात घालून दूर निबिड अरण्यात सोडून दिले आणि तसे राजाला येऊन सांगितले. त्या दुष्ट राजाला खूप आनंद झाला आणि तो दुसऱ्या अनभिषिक्त राणीबरोबर रममाण झाला.४०. त्या हिंस्र पशूंनी व्याप्त अशा निर्जन अरण्यात ती अंगावरच्या व्रणांनी पीडलेली, आपली पाउले कुठे पडताहेत याचीही शुद्ध नसलेली रूपवती राणी खड्या-काट्यांनी ठेचकाळत होती. हातात लेकरू घेऊन ती आपल्या दैवालाच बोल लावू लागली.४१.

**धृतार्भा प्राह हा दैव कष्टमीदृक् प्रदर्शितम् । सार्भा खादय हिंस्रैर्मां दुःखबन्धाद्विमोचय ।।४२।।**
**एवं सा विलपन्ती गाः प्रेक्ष्याग्रे मन्दगामिनी । आगत्य प्राह गोपान्भो तृषोत्क्रामन्ति मेऽसवः ।।४३।।**
**तामूचुस्तेऽम्ब्विहास्त्याारान् मन्दं सृत्यानया व्रज । सापि गत्वाम्बु पीत्वोचे सरस्तीरस्थ योषितः ।।४४।।**
**कोऽत्र राजा प्रजा हृष्टा भान्ति मे ब्रूत योषितः । ता ऊचुस्त्वत्र राड्वैश्यः साधुः पद्माकरः कृती ।।४५।।**

धृत+अर्भा प्राह, 'हा दैव! ईदृक् कष्टं प्रदर्शितम्। मां स+अर्भा हिंस्रैः खादय। दुःख+बन्धात् विमोचय।'४२। एवं विलपन्ती सा अग्रे गाः प्रेक्ष्य मन्द+गामिनी आगत्य गोपान् प्राह, 'भो, तृषा मे असवः उत्क्रामन्ति।'४३। ते तां ऊचुः, 'इह आरात् अम्बु अस्ति। अनया सृत्या मंदं व्रज।' सा अपि सरः गत्वा अम्बु पीत्वा तीरस्थ योषितः ऊचे।४४। 'योषितः, अत्र कः राजा मे ब्रूत। प्रजा हृष्टा भान्ति।' ता ऊचुः, 'अत्र तु वैश्यः साधुः कृती पद्माकरः राट्।'४५।

'हाय रे दैवा, कसला हा कष्टप्रद वनवास मला दाखवीत आहेस? एखाद्या हिंस्र प्राण्याच्या तोंडून मला माझ्या बाळासकट खाववीत का नाहीस? या दुःखाच्या जोखडांतून मी सुटेन तरी!' अर्थात् वाघसिंहाविषयीच्या औदार्याने ती बोलत नाही तर आपल्या असह्य शारीरिक वेदनांना कंटाळून बोलते आहे. 'मी सर्वदा असावे. माझे अस्तित्व नाही असे कधीही होऊ नये,' हे आत्म्याचे सच्चिदानंदरूपत्व सर्व प्रणिमात्र अनुभवतात. शारीरिक कष्टांना त्रासून दुःखावेशाने निघालेले हे उद्गार आहेत. पुढचे तिचे बोलणे, 'एकदाची मी या दुःखांतून सुटेन तरी!' हेच दर्शवितात.४२. असा शोक करीत करीत ती जात असताना तिला पुढे कांही गाई चरताना दिसल्या. तेव्हा हळूहळू त्या गुराख्यांकडे जाऊन म्हणाली, 'तहानेने माझे प्राण कासावीस झालेत!'४३. ते गुराखी तिला म्हणाले, 'इथे जवळच पाणी आहे. या वाटेने हळूहळू जा.' तेव्हा ती राणी त्या तळ्याकडे गेली आणि पाणी पिऊन तिथे असलेल्या स्त्रियांना म्हणाली, 'बायांनो, इथे कोण बरे राजा राज्य करतो? इथली प्रजा मला आनंदी दिसते.'४४. त्या उत्तरल्या, 'इथे पद्माकर नावाचा एक धर्मशील आणि पुण्यावान् वैश्य राजा आहे.'४५.

**अत्रान्तरेऽपि तद्दास्यः प्राप्तास्ताभिः सहाययौ । राज्ञी विट्पं पुरे दीना स तां पप्रच्छ विस्तरात् ।।४६।।**
**सा शशंसादितः सर्वं दयालुस्तां ररक्ष सः । ततः सुतोऽल्पकालेन व्रणत्रस्तोऽभ्यगान्मृतिम् ।।४७।।**
**विलपन्ती तदा तन्वी प्रेतमज्ञानतोऽब्रवीत् । त्यक्त्वा शोकार्णवे दीनां मातरं मां क्व गच्छसि ।।४८।।**
**त्वत्कृतेऽदो मया भुक्तं कष्टं तन्न स्मरस्यहो । त्वदर्थेऽन्तरिता भर्तृ-पितृमातृहितस्वकाः ।।४९।।**
**त्वदर्थं विस्मृतं दुःखं मया राट्त्यक्तयापि मे । जीवोऽसि त्वयि यातेऽहं मरिष्ये नात्र संशयः ।।५०।।**

अत्र+अन्तरे तत्+दास्यः अपि प्राप्ताः। दीना राज्ञी ताभिः सह पुरे विट्+पं आययौ। सः तां विस्तरात् पप्रच्छ।४६। सा आदितः सर्वं शशंस। सः दयालुः तां ररक्ष। ततः अल्प+कालेन व्रण+त्रस्तः सुतः मृतिं अभ्यगात्।४७। तदा विलपन्ती तन्वी अज्ञानतः प्रेतं अब्रवीत्। 'मां दीनां मातरं शोक+अर्णवे त्यक्त्वा क्व गच्छसि?४८। अहो! मया त्वत्+कृते अदः कष्टं भुक्तं तत् न स्मरसि? त्वत्+अर्थे भर्तृ+पितृ+मातृ+हित+स्वकाः अन्तरिताः। त्वत्+अर्थं राट्+त्यक्तया मया मे दुःखं अपि विस्मृतम्। जीवः असि! त्वयि याते अहं मरिष्ये अत्र न संशयः।५०।'

कांही वेळाने त्या राजाच्या दासीच तिथे आल्या. ती दीनवाणी राणी त्यांच्याबरोबरच नगरात राजाकडे आली. त्याने तिला तिची हकीकत सविस्तर विचारली.४६. तिनेही सुरुवातीपासून आपल्यावर कोसळलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. त्या दयाळू राजाने तिला आश्रय दिला. पुढे थोड्याच दिवसानी तिचा तो व्रणग्रस्त मुलगा मृत्यू पावला.४७. तेव्हा ती सुंदरी विलाप करू लागली आणि स्त्रीसुलभ मोहाने अज्ञानवश त्या प्रेतालाच बोलू लागली. 'बाळा रे, ह्या तुझ्या अनाथ आईला शोकसागरात लोटून तू कुठे जातोस?४८. तुझ्यानिमित्त मी किती कष्ट भोगले त्याची तुला कांहीच आठवण नाही का? तुझ्यामुळेच माझ्या सवतीने मला विष दिले. तुझ्याचसाठी माझी माझ्या पती, पिता, माता, मित्र आणि स्वजन यांच्यापासून ताटातूट झाली.४९. अरे बाळा, तुझ्याकडे पाहूनच मी राजाने मला टाकल्याचे दुःखही पिऊन टाकले. तू माझा प्राणच आहेस! तूच जर सोडून गेलास तरी मीही मरूनच जाणार, यात काय संशय?'५०.

**इति तद्रुदितं श्रुत्वागच्छन्हि ऋषभो मुनिः । विट्पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप करुणार्द्रधीः ।।५१।।**
**कुतो रोदिषि राज्ञीदं जगन्मायामयं ह्यसत् । भौतिके नश्वरे देहे कुतः पुत्रादिकल्पना ।।५२।।**
**कीटः कण्टकधाम्नेव यावदायुर्विचेष्टते । जीवः कर्मौघरचित-धाम्नारब्धाशनोऽवशः ।।५३।।**
**कालकर्मगुणोत्पन्नो नायं सम्बन्धलिङ्गभाक् । चिदंशः सर्वगो नित्यो देहस्त्वाद्यन्तवानचित् ।।५४।।**

इति तत्+रुदितं श्रुत्वा आगच्छन् हि करुणा+आर्द्र+धीः ऋषभः मुनिः विट्+पतिं प्राप्य तं पृष्ट्वा तां प्राप।५१। '(हे) राज्ञि कुतः रोदिषि? इदं माया+मयं जगत् असत् हि। भौतिके नश्वरे देहे पुत्र+आदि+कल्पना कुतः?'५२। 'जीवः कण्टक+धाम्ना कीटः इव यावत् आयुः कर्म+ओघ+रचित+ धाम्ना आरब्ध+अशनः अवशः विचेष्टते।'५३। 'काल+कर्म+गुण+उत्पन्नः अयं न सम्बन्ध+लिङ्ग+भाक्। चित्+अंशः सर्वगः नित्यः। देहः तु आदि+अन्त+वान् अचित्।५४।

तिचा तो विलाप ऐकून ऋषभ मुनी तिथे आले आणि त्या वैश्य राजाला भेटून त्यांनी तिची चौकशी केली. मग ते करुणासागर मुनी तिच्याकडे आले.५१. त्यांना तिच्या शोकाचे कारण कळाले असल्याने आणि हा मृत बालक आपला पूर्वजन्मीचा सेवकच आहे हे जाणून त्यांनी तिला उपदेश करायला आरंभ केला. 'राणीसाहेब, आपण का बरे रडत आहात? हे पुत्र इत्यादि जग खरे असते तर शोकाचे कारण होते. पण हे तर मायेपासून झालेले स्वप्नासारखे आभासिक आहे.' हे प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असताना भास कसा म्हणावा? त्याचे उत्तर दिले आहे, 'ह्या पांचभौतिक नश्वर देहावर पुत्र इत्यादि कल्पना कशी करतेस?'५२. (प्रश्न) 'पण ह्या भौतिक देहाच्या आश्रयानेच जन्मापसून श्मशानापर्यंत सर्व व्यवहार होतातच ना? मग पुत्रादि संबंध होतोच की!' (उत्तर) जसा एखादा किडा आपल्या शरीरावर काटेरी कोष करतो आणि त्यात विविध चेष्टा करतो तसाच जीव आपल्या पूर्वार्जित कर्मापासून झालेल्या देहाने आपल्या प्रारब्धाचा विवशतेने भोग घेतो. तो देहाहून वेगळाच असतो.५३. 'त्या जीवाचे निमित्त कारण कर्म आहे, सत्त्व, रज, तम हे गुण त्याचे उपादान कारण आहेत आणि कर्म पिकण्यासाठी आवश्यक काल हा क्षोभक आहे. त्या जीवाला न पुत्रादि..

**कोऽपि शुग्विषयो नातो धृतिमास्थाय सात्त्विकीम् । भज प्रारब्धमश्नन्ती यावदायुः परेश्वरम् ।।५५।।**
**एतावदृषभः प्रोक्त्वा विरराम तदा तु सा । अबोधविक्लवा प्राह प्रणताश्रूत्तलोचना ।।५६।।**
**भवताऽध्यात्मतत्त्वं मे प्रोक्तं कारुणिकेन सत् । सदा परिचितोऽबोधः स्थेयं नैतेन तन्मयि ।।५७।।**

कः अपि शुक्+विषयः न। अतः सात्त्विकीं धृतिं आस्थाय यावत् आयुः प्रारब्धं अश्नंन्ती पर+ईश्वरं भज।५५।' ऋषभः एतावत् प्रोक्त्वा विरराम। तदा सा तु अबोध+विक्लवा प्रणता अश्रु+उत्त+लोचना प्राह।५६। 'कारुणिकेन भवता मे अध्यात्म+तत्त्वं सत् प्रोक्तम्। अबोधः सदा परिचितः, एतेन तत् मयि न स्थेयम्।'५७।

..संबंध आहेत न स्त्रीपुरुषलिंग आहे. तो चैतन्याचा अंश असल्याने सर्वव्यापी आहे. अशा ह्या नित्य शाश्वत जीवाला अंतच नाही. मग त्याचा शोक का म्हणून करायचा? देह तर बोलूनचालून आदि आणि अंत असलेली जड वस्तू आहे. तिचाही शोक करणे व्यर्थ आहे.'५४. 'याप्रमाणे, हे राणी, शोकाचे कांही कारणच नाही. तरी सात्त्विक धैर्याचा अवलंब करून जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत प्रारब्ध भोगीत परमेश्वराची भक्ती कर!'५५.

ऋषभदेव एवढे बोलून थांबले. तेव्हा अज्ञानाने बधीर झालेली राणी, मुनींपुढे नम्र होऊन पाणावलेल्या डोळ्यांनी म्हणाली, 'आपण मोठ्या कळवळ्याने मला हे समीचीन दुर्लभ अध्यात्मज्ञान सांगितले खरे! पण सतत अज्ञानाच्याच छायेत असणाऱ्या माझ्या मनात ते स्थिरावत नाही.' कठोपनिषदांत (१:२:७) म्हटलेच आहे, 'अनेकांना ते (आत्मतत्त्व) ऐकूनही कळत नाही.'५७.

**येन मे सुप्रसन्नं स्यान् मनस्तद्धि विधीयताम् । ईशेन प्रेरितो दुःख-दशायामपि मे भवान् ।।५८।।**
**स तच्छ्रुत्वा सकारुण्यं बालं ज्ञात्वा स्वसेवकम् । प्रसन्नोऽभूत्स नत्यैव फलन्त्यत्र हि साधवः ।।५९।।**
**तपउज्वलितात्मा स साक्षाच्छम्भुरिवापरः । चिक्षेप भस्म तद्गात्रे स सुप्तोत्थितवत्स्थितः ।।६०।।**
**दत्वासिं शैवकवचं नागायुतबलं मुनिः । भूयादजेयो भद्रायू राजशास्तेत्युवाच सः ।।६१।।**

'येन मे मनः सुप्रसन्नं स्यात् तत् हि (भवता) विधीयताम्। मे दुःख+दशायां अपि भवान् ईश्वरेण प्रेरितः।'५८। सः तत् स+कारुण्यं श्रुत्वा बालं स्व+सेवकं ज्ञात्वा सः प्रसन्नः अभूत्। अत्र साधवः नत्या एव हि फलन्ति।५९। तप+उज्वलित+आत्मा साक्षात् अपरः शम्भुः इव तत्+गात्रे भस्म चिक्षेप। सः सुप्त+उत्थितवत् स्थितः।६०। मुनिः असिं शैव+कवचं (तथा) नाग+अयुत+बलं दत्वा सः उवाच, 'अजेयः भद्र+आयुः राज+शास्ता भूयात्' इति उवाच।६१।

'ज्यायोगे माझे मन सुप्रसन्न होईल असेच आपण करावे. मन प्रसन्न झाले की सर्व दुःखांचा नाश होतो (भ.गीता २:६५) माझ्या ह्या दुःखावस्थेत आपल्याला ईश्वरानेच पाठविले आहे!'५८. ते ऋषभदेव तिचे ते काकुळतीचे बोलणे ऐकून आणि तो बालक आपला सेवक आहे हे जाणून प्रसन्न झाले. खरोखर या भूतलावर साधू केवळ प्रणामानेच फलदायी होतात. (अर्थांतरन्यास) आश्वलायन गृह्यसूत्रानुसार (१:१:५) 'देवता नमस्काराचे उल्लंघन करीत नाहीत.'५९. तपाने अंतर्बाह्य तेजस्वी असे ते साक्षात् शंकरच जणू होते. त्यांनी त्या बालकाच्या शरीराच्या सर्व भागांवर भस्म प्रोक्षण केले. त्याबरोबर तो बालक झोपेतून जागल्यासारखा उठून बसला.६०.

ऋषभ मुनींनी त्याला खड्ग, शैव कवच आणि दहा हजार हत्तींचे बळ दिले आणि 'तूं अजिंक्य, दीर्घायुषी आणि राजाला शासन करणारा होशील' असा आशीर्वाद दिला. इथे श्रीस्वामिमहाराजांनी स्कंद पुराणांतील (ब्रह्मोत्तर खंड १२:३५:४२) पुढील श्लोक उद्धृत केले आहेत. '*पुनश्च भस्म संमंत्र्य तदङ्गं परितोऽस्पृशत्। खड्गाशङ्खाविमौ दिव्यौ परसैन्यविनाशिनौ।। आत्मसैन्यस्वपक्षाणां शौर्यतेजविवर्धनौ। एतयोश्च प्रसादेन शैवेन कवचेन च।। द्विषट्सहस्रनागानां बलेन महतापि च। भस्मधारणसामर्थ्याच्छत्रुसैन्यं विजेष्यति।। प्राप्य सिंहासनं पित्र्यं गोप्ताऽस्ति पृथिवीमिमाम्।।*'६१.

**तदा माता सुतोऽपि द्राग् दिव्यगात्रौ बभूवतुः । एतावान् साधुमहिमा तस्मात्तं शरणं व्रज ।।६२।।**

**।। राजोवाच ।।**

**साधु श्राव्यं त्वया प्रोक्तं सन्माहात्म्यं द्विजोत्तम । क्वास्त एतादृशः साधुस्तन्मे कथय भूसुर ।।६३।।**
**म्लेच्छोऽयं कथमस्मै तत्कथनीयमिति प्रिय । न मन्तव्यं हि दासोऽहं ब्राह्मणानां विशुद्धधीः ।।६४।।**

**।। विप्र उवाच ।।**

**मया तु भीमामरजा-सङ्गमे कश्चनास्ति सन् । साक्षात् परेश्वर इव श्रुतस्तं शरणं व्रज ।।६५।।**

'तदा माता, सुतः अपि दिव्य+गात्रौ बभूवतुः। एतावान् साधु+महिमा! तस्मात् तं शरणां व्रज।'६२। राजा उवाच। '(हे) द्विज+उत्तम, त्वया श्राव्यं सत्+माहात्म्यं साधु प्रोक्तम्। (हे) भू+सुर, एतादृशः साधुः क्व आस्ते, मे कथय।'६३। '(हे) प्रिय, अयं म्लेच्छः अस्मै कथं कथनीयं इति न मन्तव्यम्। अहं विशुद्ध+धीः, ब्राह्मणानां दासः।'६४। विप्र उवाच। 'मया तु श्रुतं, भीमा+अमरजा+सङ्गमे कश्चन पर+ईश्वर इव अस्ति। तं शरणं व्रज।'६५।

तेव्हा लगेच त्या मायलेकांची शरीरे व्रणरहित आणि दिव्य झाली. 'राजेसाहेब, असा हा संतांचा महिमा आहे. तेव्हा तुम्ही त्यांना शरण जा.'६२. राजाने विचारले, 'ब्रह्मश्री, आपण हे श्रवणीय असे साधूंचे माहात्म्य छान सांगितलेत. असा संतश्रेष्ठ मला कुठे भेटेल ते मला सांगा.'६३. 'हा मुसलमान आहे, ह्याला कसे सांगावे?' असा विचार कृपया मनात आणू नका. मी शुद्ध बुद्धीने विचारीत आहे आणि मी ब्राह्मणांचा सेवक आहे!'. त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'भीमा-अमरजा संगमावर असा कुणी एक परमेश्वरस्वरूप महात्मा आहे, असे माझ्या ऐकण्यात आले आहे. तुम्ही त्यांना शरण जा!'६५.

**तच्छ्रुत्वा सत्वरं राज्यमेत्य राजा बलान्वितः । प्रतस्थे स्वासनारूढः साधुसंदर्शनाय सः ॥६६॥**
**गन्धर्वपुरमासाद्य पौरान् पप्रच्छ कश्चन । आस्तेऽत्र तापसस्तं मे भवन्तो दर्शयन्त्वरम् ॥६७॥**
**म्लेच्छान्दृष्ट्वापि ते भीता नोचुः क्रुद्धोऽब्रवीन्नृपः । तद्दर्शनायागतोऽस्मि कुत्रास्ते स तु कथ्यताम् ॥६८॥**
**तदोचुः सङ्गमेऽस्तीति तच्छ्रुत्वा सत्वरं नृपः । पादचारी नदीं गत्वा ददर्श श्रीगुरुं परम् ॥६९॥**
**तमपि प्रेक्ष्य भगवान् प्राह रे रजकानुग । कुत्र तिष्ठसि कच्चित्त्वं क्षेमी नेहागतः कुतः ॥७०॥**

तत् श्रुत्वा सः राजा सत्वरं राज्यं एत्य बलान्वितः स्वासन+आरूढः साधु+संदर्शनाय प्रतस्थे।६६। गन्धर्वपुरं आसाद्य पौरान् पप्रच्छ, 'अत्र कश्चन तापसः आस्ते। भवन्तः तं मे अरं दर्शयन्तु।'६७। ते म्लेच्छान् दृष्ट्वा भीताः न ऊचुः। नृपः क्रुद्धः अब्रवीत्। 'तत्+दर्शनाय आगतः अस्मि। सः तु कुत्र आस्ते कथ्यताम्।'६८। तदा (ते) ऊचुः, 'सङ्गमे अस्ति' इति। तत् श्रुत्वा नृपः सत्वरं पादचारी गत्वा परं गुरुं ददर्श।६९। भगवान् अपि तं प्रेक्ष्य प्राह, 'रे रजक, अनुग, कुत्र तिष्ठसि? कच्चित् त्वं क्षेमी? कुतः इह न आगतः?'७०।

त्या ब्राह्मणाच्या सांगण्यानुसार तो राजा लगेच घाईने बिदरला आला आणि आपल्या पालखीत बसून सैन्यासह संतदर्शनासाठी गाणगापूरला निघाला.६६. तिथे येऊन त्याने तिथल्या लोकांना विचारले, 'इथे कुणी तपस्वी महात्मे राहतात; ते कुठे आहेत ते मला लवकर दाखवा!'६७. नगरवासी त्या सगळ्या मुसलमानांना पाहून घाबरून कांहीच बोलेनात. त्यावर राजा चिडून म्हणाला, 'अहो, मी त्यांच्या दर्शनासाठी आलो आहे. ते कुठे आहेत ते सांगा ना!'६८. मग त्यांनी त्याला सांगितले की 'स्वामी संगमावर आहेत.' ते ऐकताच राजा पालखीतून उतरला आणि लगबगीने पायीच चालत नदीवर जाऊन त्याने त्या परमश्रेष्ठ श्रीगुरूंचे दर्शन घेतले.६९. त्याला पाहताच श्रीगुरू म्हणाले, 'अरे माझ्या भक्ता रजका, कुठे असतोस? तू सकुशल आहेस ना? इतके दिवस का आला नाहीस? मला सांग!'७०.

**तच्छुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्धप्राक्स्मृतिरब्रवीत् । त्वद्दत्तराज्यसक्तेन तवाङ्घ्री विस्मृतौ मया ॥७१॥**
**योऽहं प्राग्रजकः सार्व-भौमः सोऽभवमीदृशी । त्वत्कृपा सत्यसङ्कल्प मम मन्तून् क्षमस्व भोः ॥७२॥**
**श्रीपाद रजकं कृष्णा-विहारे पाहि मानुगम् । लोलन्मस्तकबाह्वङ्घ्रि गलद्धर्षाश्रुमानतम् ॥७३॥**
**स्फोटकार्तिनिमित्तेन लब्धं ते दर्शनं हरे । अन्तर्गतापि संविन्मे लब्धैतर्हि निमेषतः ॥७४॥**

तत् श्रुत्वा श्रीपदं ज्ञात्वा लब्ध+प्राक्+स्मृतिः अब्रवीत्। 'मया त्वत्+दत्त+राज्य+सक्तेन तव अङ्घ्री विस्मृतौ।'७१। '(हे) सत्य+सङ्कल्प, यः अहं प्राक् रजकः सः सार्वभौमः अभवम् ! ईदृशी त्वत्+कृपा। भोः मम मन्तून् क्षमस्व।'७२। '(हे) कृष्णा+विहारे श्रीपाद, लोलन्+मस्तक+बाहु+अङ्घ्रि गलत्+हर्षाश्रुं, आनतम् मां अनुगं पाहि।'७३। '(हे) हरे, स्फोटक+आर्ति+निमित्तेन ते दर्शनं लब्धम्। मे संवित् अन्तः+गता अपि एतर्हि निमेषतः लब्धा।'७४।

श्रीगुरूंचे वचन कानांवर पडताच राजाची पूर्वजन्मीची स्मृती जागली आणि हेच आपले गुरू श्रीपाद आहेत हे जाणून तो म्हणाला,(७१) 'आपणच दिलेल्या राज्यात आसक्त होऊन मी आपले चरण विसरून की हो गेलो!' 'असं का? मग सांग बरे मी कोण आहे?' असा श्रीगुरूंचा प्रश्न अपेक्षून तो राजा पुढच्या तीन श्लोकांत सांगतो आहे.(७२) 'प्रभो, आपले वचन कधीच मिथ्या होत नाही! पूर्वजन्मी मी जो परीट होतो तोच आता हा सार्वभौम राजा झालो आहे. असा आपला कृपाप्रभाव आहे! महाराज, माझ्या अपराधांची क्षमा करा.'७२. 'कृष्णातीरी रमणाऱ्या श्रीपादगुरो, हात, पाय आणि मस्तक थरथरत असताना, डोळ्यांतून हर्षाश्रू गाळीत आपल्यासमोर वाकलेल्या आपल्या सेवकाचे रक्षण करा!' सर्वांगाचा कंप आणि सात्त्विक भावांचा उद्रेक यातून राजावर शक्तिपात झाल्याचे संकेत मिळतात.७३. 'हरे, या स्फोटकाच्या दुखण्याच्या निमित्ताने आज आपले दर्शन झाले आणि माझी हरवलेली जाणीवही आत्ता एका क्षणात परतली!'७४.

**स्फोटकं दर्शय क्वास्त इत्युक्तो गुरुणा स तु । सन्तं स्फोटकमप्यङ्के न दृष्ट्वा चकितोऽब्रवीत् ।।७५।।**
**स्वामिन्मन्येऽनुगोऽयं ते स्फोटकोऽनयवर्तिनम् । आनीय दण्ड्यमन्यत्र कृतकार्यो ययौ खलु ।।७६।।**
**तव जाग्रत्सु वाक्येषु दुःखदोषपरिप्लुते । असारे सति संसारे मग्नं माज्ञं समुद्धर ।।७७।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**तृप्तं तेऽपि मनो भोगैर् भुक्तं राज्यमपीप्सितम् । लब्धाः पुत्रादयो वापि का वापेक्षास्ति ते वद ।।७८।।**

गुरुणा, 'स्फोटकं क्व अस्ति, दर्शय!' इति उक्तः सः तु अङ्के सन्तं स्फोटकं अपि न दृष्ट्वा चकितः अब्रवीत्।७५। '(हे) स्वामिन्, अयं स्फोटकः ते अनुगः मन्ये। अनय+वर्तिनं दण्ड्यं (मां) आनीय कृत+कार्यः अन्यत्र ययौ खलु।७७। तव जाग्रत्सु वाक्येषु दुःख+दोष+परिप्लुते असारे संसारे मग्नं मां अज्ञं समुद्धर।'७७। श्रीगुरुः उवाच। 'ते मनं भोगैः तृप्तम्? अभीप्सितं राज्यं अपि भुक्तम्? पुत्र+आदयः अपि लब्धाः वा? का वा अपेक्षा अस्ति? वद।'७८।

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुला स्फोटक झाला आहे का? दाखव पाहू कुठे आहे?' तेव्हा राजाने पाहिले मांडीवर असलेला तो फोड नाहीसाच झाला आहे! तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.७५. 'स्वामिमहाराज, हा स्फोटक तुमचाच दूत असावा. अन्यायाने वागणाऱ्या, शिक्षापात्र अशा मला इथे आणून, आपले काम होताच इतरत्र निघून गेला वाटते!'७६. 'महाराज, पूर्वजन्मी आपल्या जाग्रत वचनांचा उपदेश असूनही मी या दुःखदोषांनी बरबटलेल्या सारहीन संसारात निमग्न झालो आहे. आपणच माझा यातून उद्धार करा.'७७. श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'तुझे मन भोगांनी तृप्त झाले का? तुला ज्याची तीव्र कामना होती ते राज्य भोगून झाले ना? पुत्रादि सर्व लाभले ना? का आणखी कांही अपेक्षा आहे, मला सांग.'७८.

**स प्राह परिपूर्णं मे सर्वं ते कृपयेश्वर । त्वद्दत्ताप्यखिला ते श्रीरर्पणीयेत्यपेक्षितम् ।।७९।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**यतेर्मे गमनं म्लेच्छ गोघ्ने राज्ये कथं भवेत् । मां वर्णास्त्वामपि म्लेच्छ हसिष्यन्ति न संशयः ।।८०।।**

**।। राजोवाच ।।**

**रजकोऽहं भवान्छ्रीपान् न हिंसातःपरं पुरे । इत्युक्त्वा लोलदङ्गस्तं नेतुकामोऽस्तुवद्विभुम् ।।८१।।**

सः प्राह, '(हे) ईश्वर, ते कृपया मे सर्वं परिपूर्णम्। त्वत्+दत्ता अखिला श्रीः अर्पणीया इति अपेक्षितम्।'७९। श्रीगुरुः उवाच। 'रे म्लेच्छ, मे यतेः गो+घ्ने राज्ये गमनं कथं भवेत्? मां वर्णाः त्वां अपि म्लेच्छाः हसिष्यन्ति न संशयः।'८०। राजा उवाच। 'अहं रजकः, भवान् श्रीपादः। अतःपरं पुरे हिंसा न।' इति उक्त्वा लोलत्+अङ्गः तं नेतु+कामः विभुं अस्तुवत्।८१।

तो यवन राजा उत्तरला, 'महाराज, आपल्या कृपेने माझे सर्व कांही परिपूर्ण झाले आहे. आता आपण दिलेले हे सर्व ऐश्वर्य आपल्याला समर्पित करावे हीच एक इच्छा आहे!'७९. श्रीगुरू म्हणाले, 'अरे यवना, माझ्यासारख्या संन्याशाला, जिथे नित्य गोहत्या होते त्या राज्यात कसे बरे जाता येईल? मला वर्णाश्रमधर्माचे लोक (हिंदू), आणि तुलाही सगळे मुसलमान निःसंशय हसतील की!' इथे टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी '**गो** म्हणजे वेदांची विधिवचने (आज्ञा) यांची हत्या म्हणजे नास्तिक्याने अवज्ञा होते अशा तुझ्या राज्यात मी संन्यासी कसा येऊ?' असा पर्यायी अर्थ दिला आहे.८०. राजा म्हणाला, 'मी जरी सांप्रत जातीने मुसलमान असलो तरी पूर्वजन्माची स्मृती आल्याने आपण श्रीपादस्वामी आहात आणि मी आपला सेवक रजक आहे. याउप्पर माझ्या नगरीत गोहिंसा होणार नाही.' असे बोलून कापऱ्या शरीराने श्रीप्रभूंना आपल्या राज्याला नेण्याच्या इच्छेने तो त्यांची स्तुती करू लागला.८१.

**स प्राह तुष्ट आयास्ये भक्ताधीनोऽस्मि केवलम् । हेतुनानेन नोपेक्ष्या मद्भक्ता मद्गतान्तराः ।।८२।।**
**स तच्छ्रुत्वोपवेश्येशं प्रतीतः स्वासने नृपः । वाहान्दत्वापि शिष्येभ्यो धृततत्पादुकोऽन्वगात् ।।८३।।**
**प्राहाङ्घ्रिचारिणं स्वामी तं तदारादितो नृप । गन्तव्यमस्त्यपीदं तु न श्लाघ्यं सार्वभौम ते ।।८४।।**
**स प्राह सार्वभौमः को रजकस्तेऽनुगोऽस्म्यहम् । त्वयैव न्यस्तभूधूस्त आज्ञयानुचराम्यहम् ।।८५।।**

तुष्टः सः प्राह, 'आयास्ये। केवलं भक्त+अधीनः अस्मि। अनेन हेतुना मत्+गत+अन्तराः मत्+भक्ताः न उपेक्ष्याः।'८२। सः प्रतीतः नृपः तत् श्रुत्वा ईशं स्व+आसने उपवेश्य, शिष्येभ्यः अपि वाहान् दत्वा धृत+तत्+पादुकः अन्वगात्।८३। तत् तं अङ्घ्रि+चारिणं स्वामी प्राह, 'इतः आरात् गन्तव्यं अस्ति। (हे) सार्वभौम, इदं अपि तु ते न श्लाघ्यम्।'८४। सः प्राह, 'कः सार्वभौमः? अहं ते अनुगः रजकः अस्मि। त्वया एव न्यस्त+भू+धूः अहं ते आज्ञया चरामि।'८५।

त्याने प्रसन्न होऊन श्रीपाद त्याला म्हणाले, 'बरे तर, येतो मी! मी केवळ भक्तपराधीन आहे. त्याकरिता ज्यांनी आपल्या चित्तांत मला धरून ठेवले आहे अशा माझ्या भक्तांची उपेक्षा करू नये.'८२. राजाला आनंद वाटला. त्याने लगेच श्रीगुरूंना आपल्या पालखीत बसविले, त्यांच्या शिष्यांनाही वाहने दिली आपण श्रीगुरूंच्या पादुका हातात घेऊन तो पायीच त्यांच्या मागे निघाला.८३. त्याला तसे पायी चालतांना पाहून स्वामी म्हणाले, 'आपल्याला इथून बरेच दूर जायचे आहे. तुझ्यासारख्या सार्वभौम राजाला हे असे पायी चालणे शोभत नाही.' ८४. तो राजा म्हणाला, 'कोण सार्वभौम राजा? महाराज! मी तर आपला दास रजक आहे. आपणच माझ्या खांद्यावर दिलेली हा राज्याची धुरा मी वाहतो आहे आणि आपल्याच आज्ञेत राहतो आहे.'८५.

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**दत्तं ते दिक्पमात्राभी राट्त्वं तेनासि विष्णुवत् । राजन्ममाज्ञयैवाश्वमारुह्य व्रज मा वद ।।८६।।**
**ततः सोऽप्यारुरोहाश्वं तमाह भगवान्नृप । गत्यानया क्रियालोपो भवेदग्रे व्रजाम्यतः ।।८७।।**
**एहि मन्दं पापनाश-तीर्थे तिष्ठामि भूपते । इत्युक्त्वार्धक्षणात् पङ्क्ति-योजनायतमापतत् ।।८८।।**
**सशिष्यः स तु तत्तीर्थे सान्ध्यं कर्माकरोत्तदा । सायंदेवसुतो नाग-नाथो गच्छन् ददर्श तम् ।।८९।।**

श्रीगुरुः उवाच। '(हे) राजन्, ते दिक्+प+मात्राभिः राट्+त्वं दत्तम्। तेन (त्वं) विष्णु+वत् असि। मम आज्ञया एव अश्वं आरुह्य व्रज। मा वद।'८६। ततः सः अपि अश्वं आरुरोह। भगवान् तं आह, 'अनया गत्या क्रिया+लोपः भवेत्। अतः अग्रे व्रजामि।'८७। 'भूपते, मन्दं एहि। पापनाश+तीर्थे तिष्ठामि।' इति उक्त्वा अर्ध+क्षणात् पंक्ति+योजन+आयतं आपतत्।८८। तत् सः तु सशिष्यः सांध्यं कर्मं अकरोत्। तदा सायंदेव+सुतः नागनाथः गच्छन् तं ददर्श।८९।

**हीन यातीचा राजाही आदरणीय.** श्रीगुरु त्याला म्हणाले, 'अरे राजा, मी तुला दिक्पालांच्या अंशापासून राजेपण दिलेले आहे. त्यामुळे तू विष्णुसमान आहेस. तरी माझी आज्ञा म्हणूनच तू आता कांही न बोलता घोड्यावर स्वार हो.' ह्यातून असे सूचित केले आहे की युगमानाने जरी राजा हीन जातीचा असला तरी त्याचा आदर केला पाहिजे आणि त्याच्या शासनाचे अतिक्रमण करू नये.८६. मग तो राजाही घोड्यावर बसला. त्याला श्रीगुरू भगवान् म्हणाले, 'ह्या मंद गतीने गेल्यास माझ्या नित्यकर्माचा लोप होईल. त्यासाठी मी पुढे जातो.'८७. 'आणि राजा, तू सावकाश ये. मी पापनाशतीर्थावर थांबतो.' एवढे बोलून श्रीगुरू क्षणार्धांत दहा योजन (४० कोस किंवा १०० मैल) दूर बिदरजवळील पापनाश तीर्थाला पोचले (गाणगापूरहून बिदर ११० कि.मी. आहे).८८. तिथे श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांसह संध्याकाळचे कर्म केले. तेवढ्यात सायंदेवाचा वडील मुलगा नागनाथाने तिथे येऊन श्रीगुरूंचे दर्शन घेतले.८९.

**चकोरश्चन्द्रमिव तं दृष्ट्वा हृष्टः स्वदैवतम् । संप्रार्थ्य स्वगृहं नीत्वा भोजयामास सादरम् ।।९०।।**
**सशिष्यस्तद्गृहे भुक्त्वा तमाहैष्यति राडिह । स तु म्लेच्छो न साध्वेतत्तीर्थे स्थेयमतो द्विज ।।९१।।**
**इत्युक्त्वा स ययौ तीर्थं स राजाप्याययौ तदा । प्रतीतः पादचारी स निन्ये निजपुरं गुरुम् ।।९२।।**
**अलङ्कृतं शुभं नाना-रत्नतोरणमण्डितम् । पताकाध्वजसङ्कीर्णं पुरं भास्वत्सुशोभनम् ।।९३।।**
**गीतवाद्यजयध्वान-सङ्कुलं शिष्ययुग्गुरुः । नीराजितो रत्नदीपैः पालकस्थो विवेश सः ।।९४।।**

तं स्व+दैवतं चकोरः चन्द्रं इव दृष्ट्वा हृष्टः संप्रार्थ्य स्व+गृहं नीत्वा सादरं भोजयामास।९०। (श्रीगुरुः) सशिष्यः तत्+गृहे भुक्त्वा तं आह, 'राट् इह एष्यति। स तु म्लेच्छः। न एतत् साधु। अतः (हे) द्विज, तीर्थे स्थेयम्।'९१। इति उक्त्वा सः तीर्थं ययौ। तदा सः राजा अपि आययौ। सः प्रतीतः पादचारी गुरुं निज+पुरं निन्ये।९२। अलङ्कृतं शुभं नाना+रत्न+तोरण+मण्डितं पताका+ध्वज+सङ्कीर्णं सुशोभनं भास्वत् गीत+वाद्य+जय+ध्वान+सङ्कुल सः पालक+स्थः शिष्ययुक् गुरुः पुरं रत्न+दीपैः नीराजितं विवेश।९३-९४।

आपले दैवतच असलेल्या श्रीगुरूंना पाहून चकोराला चंद्रदर्शनाने व्हावा तसा आनंद त्याला झाला. या दृष्टांताने त्याला गुरुदर्शनाची किती ओढ होती ते दाखविले आहे. त्याने आग्रहाची प्रार्थना करून सर्वांना आपल्या घरी नेऊन आदरपूर्वक भोजन दिले.९०. शिष्यांसह नागनाथाच्या घरी भोजन घेतल्यावर श्रीगुरू त्याला म्हणाले, 'भटजी, आता थोड्याच वेळात राजा इथे येईल. तो तर तुला मुसलमान आहे. ते कांही बरे नाही. तरी आम्ही तीर्थावरच थांबतो.'९१. असे म्हणून ते तीर्थाला गेले. तितक्यात राजाही येऊन पोचला. श्रीगुरूंना पाहून त्याला आनंद झाला. स्वतः पायी चालत त्याने श्रीगुरूंना पालखीत बसवून आपल्या नगरीत नेले.९२. संपूर्ण शहर नाना रत्नांची तोरणे, पताका, ध्वज, यांनी शृंगारले होते. त्या सुशोभित, सुप्रकाशित आणि शुभालंकृत शहरात गीत, वाद्य आणि जयजयकारच्या गजरात, पालखीत बसून श्रीगुरूंनी शिष्यांसह प्रवेश केला. त्या वेळी त्यांना रत्नदीपांनी ओवाळण्यांत आले.९३-९४.

**पट्टकूलच्छत्रसृत्या नीत्वान्तःपुरमीश्वरम् । भद्रासने तूपवेश्य पूजयामास तं नृपः ।।९५।।**
**शिष्यान् यथास्वपीठस्थान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः । पुत्रान्पौत्रान्सखीन्स्वांश्च दर्शयामास शंभवे ।।९६।।**
**गीतं सवाद्यं नृत्यं च छत्रचामरमालिने । तस्मै समर्प्य प्रकृतीर् दर्शयामास सर्वशः ।।९७।।**
**म्लेच्छा विरुद्धचेष्टं धिक्-चक्रुर्भूपं द्विजार्चकम् । प्रशशंसुर्द्विजा राजा पुण्यश्लोकोऽयमित्यपि ।।९८।।**
**गुरुस्तमाह हृष्टोऽस्मि दृष्ट्वा ते प्रकृतीः शुभाः । तुष्टोऽस्याभिर्न वा ब्रूहि निःशङ्कं निकटं मम ।।९९।।**

पट्टकूल+छन्न+सृत्या अन्तःपुरं नीत्वा तु भद्र+आसने उपविश्य नृपः तं पूजयामास।९५। यथा+स्वपीठान् शिष्यान् प्रपूज्य महिषीः स्त्रियः पुत्रान् पौत्रान् सखीन् स्वां च शंभवे दर्शयामास।९६। सवाद्यं गीतं नृत्यं च छत्र+चामर+मालिने तस्मै सर्वशः प्रकृतीः समर्प्य दर्शयामास।९७। म्लेच्छा विरुद्ध+चेष्टं द्विज+अर्चकं भूपं धिक् चक्रुः। द्विजाः 'अयं राजा पुण्य+श्लोकः' इति अपि प्रशशंसुः।९८। गुरुः तं आह, 'अस्याभिः तुष्टः असि? न वा? मम निकटं निःशंकं ब्रूहि।'९९।

राजाने त्यांना गालिच्यांनी मढवलेल्या मार्गाने अंतःपुरांत नेऊन सिंहासनावर बसवून राजोपचारांनी सत्कार केला.९५. शिष्यांनाही आपापल्या योग्यतेप्रमाणे आसने देऊन त्यांची उत्तम प्रकारे पूजा केली. मग राजाने आपल्या पट्टराण्या, इतर स्त्रिया, मुले, नातवंडे, मित्र, मैत्रिणी, स्वजन सर्वांना श्रीगुरूंना भेटविले.९६. श्रीगुरूंवर छत्र धरून व त्यांच्यावर चवऱ्या ढाळत त्यांना आपल्या सर्व मंत्री, सुहृद, कोश, सैन्य सन्माननीय पौर इत्यादि सर्व प्रकृती (वैभव) दाखविल्या. (*स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च। सेनाङ्गानि प्रकृतयः पौराणां श्रेणयोऽपि च।।* अमरकोश २:८:१७-१८).९७. त्या वेळी मुसलमान लोक ह्या ब्राह्मणांची पूजा करणाऱ्या धर्माविरुद्ध वागणाऱ्या राजाचा धिक्कार करू लागले. ब्राह्मण मात्र 'हा राजा पुण्यश्लोक आहे!' अशी त्याची भलाई करू लागले.९८.

श्रीगुरूंनी त्याला विचारले, 'या सगळ्या वैभवाने तू संतुष्ट आहेस ना? की नाहीस? मला निःशंकपणे सांग.'९९.

**स प्राहाभिर्न तुष्टोऽस्मि साम्राज्यं तेऽङ्घ्रिसंस्थितम् ।श्रुत्वा तत्परमं काङ्क्षे दुरापमपि देहि मे ।।१००।।**
**अद्यैव भवते कुर्वे सर्वस्वात्मनिवेदनम् । इत्युक्त्वा स तथा चक्रे राट् सङ्कल्पपुरःसरम् ।।१०१।।**

**।। श्रीगुरुरुवाच ।।**

**कृतं साधु त्वया भूप तुष्टोऽनेन ददामि ते । मन्मनस्काय भक्ताय शुद्धभावाय काङ्क्षितम् ।।१०२।।**

सः प्राह, 'न तुष्टः अस्मि। ते अङ्घ्रि+संस्थितं साम्राज्यं श्रुत्वा तत् परमं काङ्क्षे। दुरापं अपि मे देहि।'१००। 'अद्य एव भवते सर्वस्व+आत्म+निवेदनं कुर्वे।' इति उक्त्वा राट् सङ्कल्प+पुरःसरं तथा चक्रे।१०१। श्रीगुरुः उवाच। '(हे) भूप, त्वया साधु कृतम्। अनेन तुष्टः मत्+मनस्काय भक्ताय शुद्ध+भावाय ते कांक्षितं ददामि।१०२।'

तेव्हा तो राजा उत्तरला, 'नाही महाराज! मी याने समाधानी नाही. आपल्या चरणसेवारूप साम्राज्याची मला आस आहे. कितीही दुष्प्राप्य असेल तरी ते मला द्या!'१००. 'सर्वस्वाचे आणि आपले समर्पण केल्यावाचून आपली चरणसेवा दुर्लभ असेल तर आजच मी माझे राज्यादि सर्वस्व आणि हा देह या सर्वांचे निवेदन करतो.' असे बोलून राजाने '*अनेन विश्वात्मा प्रसीदतु*' असा संकल्प करून मनःपूर्वक सर्वस्वात्मनिवेदन केले.१०१.

**भक्ताची जातपात पाहू नये.** श्रीगुरू म्हणाले, 'राजा, तूं हे मोठे सत्कार्य केलेस! ह्या आत्मसमर्पणाने माझ्या सर्वात्मकाच्या ठिकाणी तुझी वृत्ती अनन्य झाली आहे. आता तुला तुझी वांछित चरणसेवा देतो!' नीच यातीच्या मुसलमानाला कशी चरणसेवा दिली? या प्रश्नाचे उत्तर **'शुद्धभावाय भक्ताय'** या विशेषणात आहे. रागादि मल चित्तांतून गेल्याने त्या राजाचा (स्व)भाव शुद्ध झाला होता. '*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्*'।।९:३२।। या गीतावचनानुसार भगवंताच्या भक्तांसाठी वर्णादींचे प्रयोजन नाही. भक्तीच्या उत्पत्तीसाठी आपल्या वर्णाश्रमानुसार विहित कर्माचे अनुष्ठान करून चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. पण पूर्वजन्माच्या कांही संस्कारांनी जागलेल्या भक्तीचा कोणाला नाश करता येईल? तो राजा यवन असला तरी त्याच्या पूर्वसंस्कारांनी त्याच्या चित्तात भक्तीचा उदय झाला आहे. त्याच्या जातपातीमुळे तिला बाध येऊ शकत नाही. म्हणून श्रीगुरूंनी त्याला आपली चरणसेवा दिली यावर कांहीही आक्षेप घेता येत नाही.१०२.

**इत्युक्त्वा श्रीगुरुर्यूने भूधुरं पार्थिवार्पिताम् । ज्येष्ठायादाद्विनीताय तदौरससुताय सः ।।१०३।।**
**भूपं प्राह गुरुः शीघ्रं प्रव्रजाहमितो द्रुतम् । गत्वा मठं समाश्वास्य शिष्यान्भक्तानपीतरान् ।।१०४।।**
**श्रीपर्वतं गमिष्यामि त्वमप्येहि नगोत्तमे । भवेन्मे दर्शनं तत्र जीवन्मुक्तो भविष्यसि ।।१०५।।**
**इत्युक्त्वा गौतमीं गत्वा स्नात्वा शिष्यान्वितः प्रभुः । संप्राप्तोऽमरजाभीमा-सङ्गमं योगिजीवनः ।।१०६।।**

इति उक्त्वा सः श्रीगुरुः पार्थिव+अर्पितं भूधुरं यूने, ज्येष्ठाय विनीताय तत्+औरस+सुताय अदात्।१०३। गुरुः भूपं प्राह, 'शीघ्रं प्रव्रज। अहं इतः द्रुतं मठं गत्वा, शिष्यान्, भक्तान् इतरान् अपि समाश्वास्य।१०४। श्रीपर्वतं गमिष्यामि। त्वं अपि नग+उत्तमे एहि। तत्र मे दर्शनं भवेत्। (त्वं) जीवन्+मुक्तः भविष्यसि।१०५।' इति उक्त्वा शिष्य+अन्वितः योगिजीवनः प्रभुः गौतमीं गत्वा स्नात्वा अमरजा+भीमा+सङ्गमं संप्राप्तः।१०६।

असे त्या राजाशी बोलून श्रीगुरूंनी त्याने अर्पण केलेली राज्यधुरा कामंदकाच्या वचनानुसार (*विनीतमौरसं पुत्रं यौवराज्येऽभिषेचयेत्।* २:६-७) त्याच्या तरुण, ज्येष्ठ, विनयशील औरस पुत्राला दिली.१०३. पुनः त्यांनी राजाला सांगितले, 'तू आता लवकर सगळी अहंता आणि ममता सोडून इथून - ह्या तुझ्या राज्यांतून, बाहेर पड. मीहि आता लगेच गाणगापुरच्या मठाला जाऊन तिथे सर्व शिष्याचे, भक्तांचे आणि इतरांचेही समाधान करून(१०४) श्रीशैल्याला जाणार आहे. तूही त्या पवित्र पर्वतावर ये. तिथे आपली भेट होईल आणि तू कृतार्थ होशील.'१०५.

याप्रमाणे त्या बादशहाशी बोलून शिष्यपरिवारासहित श्रीगुरूंनी गोदावरी नदीला जाऊन तिथे सिंहस्थ पर्वणीचे स्नान केले. आणि परत अमरजा-भीमा संगमावर आले.१०६. तेथील सर्व लोकांना आनंद झाला. त्यांनी श्रीगुरूंची पूजा करून त्यांच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मणभोजने केली.१०७.

**तत्रत्या अपि तं दृष्ट्वा सर्वे जल्हादिरे तदा । नीराज्य श्रीगुरुं चक्रुस् तदर्थं ब्रह्मभोजनम् ।।१०७।।**
**सर्वत्र प्रसृता भक्तिर् म्लेच्छा अपि भजन्त्यतः । कलौ घोरेऽत्र न स्थेयं साक्षादेवेत्यमंस्त सः ।।१०८।।**
**श्रीशैलमुक्तवद्गत्वा म्लेच्छायापि स सद्गतिम् । सर्वस्वात्मार्पणाद्दत्वा पुनः प्रापाव्ययो मठम् ।।१०९।।**
**तस्थौ भजत्कामधेनुः प्रत्यक्षस्तत्र वै सताम् । अगोचरस्त्वनार्याणां जन्मान्धानामिवोष्णगुः ।।११०।।**

तत्रत्या सर्वे अपि तदा तं दृष्ट्वा जल्हादिरे। श्रीगुरुं नीराज्य तत्+अर्थं ब्रह्म+भोजनं चक्रुः।१०७। 'भक्तिः सर्वत्र प्रसृता, म्लेच्छा अपि भजन्ति। अतः अत्र घोरे कलौ साक्षात् न स्थेयम्।' इति सः अमंस्त।१०८। उक्त+वत् सः श्रीशैलं गत्वा म्लेच्छाय अपि सर्वस्व+अर्पणात् सत्+गतिं दत्वा पुनः अव्ययः मठं प्राप(१०९) तस्थौ। भजत्+काम+धेनुः तत्र सतां वै प्रत्यक्षः। अन+आर्याणां तु जन्म+अन्धानां उष्णगुः इव अगोचरः।११०।

'आपल्या भक्तीचा आता सगळीकडे प्रसार झाला आहे. त्यामुळे मुसलमानही आपल्याला भजतील. म्हणून या घोर कलियुगात आपण साक्षात् - दृश्यमान स्वरूपात, राहू नये' असा प्रभूनी विचार केला.१०८. मग बादशहाला सांगितल्याप्रमाणे ते श्रीशैल्य पर्वताला गेले. त्या यवन राजाच्या सर्वस्वासहित आत्मसमर्पणाच्या फलस्वरूप त्याला उत्तम गती दिली आणि ते अविनाशी प्रभू मठात येऊन तिथेच राहिले. इथे **अपि** शब्दातून हे सुचविले आहे की इतरही भक्तांना ते सद्गती देतातच.१०९. भक्तांची कामधेनूच असलेले, नित्य भक्तांच्या कामना पुरविणारे श्रीगुरू आजही भक्तांना प्रत्यक्षच आहेत. अनार्यांना - नास्तिकांना, अभक्तांना, निंदकांना, तपहीनांना मात्र ते, जन्मांधाला जसा सूर्य, तसे अगोचर आहेत.११०.

**कृष्णापञ्चनदीयोगे प्रातः स्नात्वात्र सङ्गमे । कर्म कृत्वाह्निकं भिक्षां मठे भुक्त्वैव तिष्ठति ।।१११।।**
**दर्शिता विविधा लीला दर्शयत्यप्यनन्तशः । दर्शयिष्यति को वेत्ति प्रभावं तस्य दुर्ग्रहम् ।।११२।।**
**यो यो यस्य तु कामस्तद्भजनात्सिद्धिमेत्यरम् । भजतोऽनुभजत्येष यतोऽसौ भक्तिभावनः ।।११३।।**
**जागरूका कलौ प्रायः काचिन्न भगवत्कला । तत्साक्षाद्भगवन्तं तं श्रद्धयाऽसंशयं भज ।।११४।।**
**इति सिद्धोदितं श्रुत्वा श्रद्धयाऽसंशयं गुरुम् । अभ्यर्च्याऽऽपामृतं द्राक् तच्छ्रवणान्नामधारकः ।।११५।।**

(श्रीगुरुः) प्रातः कृष्णा+पञ्चनदी+योगे स्नात्वा सङ्गमे आह्निकं कर्म कृत्वा मठे भुक्त्वा (तत्र) एव तिष्ठति।१११। विविधा लीला दर्शिता, अनन्तशः दर्शयति, दर्शयिष्यति अपि। तस्य दुर्ग्रहं प्रभावं कः वेत्ति?११२। यः यः यस्य कामः तत्+भजनात् अरं सिद्धिं एति, यतः एष असौ भक्ति+भावनः भजतः अनुभजति।११३। 'कलौ प्रायः काचित् भगवत्+कला न जागरूका। तत् तं साक्षात् भगवन्तं श्रद्धया असंशयं भज।'११४। इति सिद्ध+उदितं श्रुत्वा नामधारकः गुरुं असंशयं अभ्यर्च्य तत्+श्रवणात् द्राक् अमृतं आप।११५।

आजही श्रीगुरू प्रातःकाळी नरसोबाच्या वाडीला कृष्णा-पंचगंगा संगमावर स्नान करून इथे भीमामरजा संगमावर आह्निक करून मठात भिक्षा (भोजन) करून तिथेच राहतात.१११. आजवर त्यांनी कित्येक लीला दाखविल्या आहेत, अगणित लीला आजही दाखवीत आहेत आहेत, भविष्यातही अशाच दाखविणार आहेत. त्यांचा अगम्य प्रभाव कुणी जाणला आहे?११२. इथे सेवा करणाऱ्यांच्या ज्या ज्या कामना असतील त्या त्या इथे तत्काल संपूर्ण होतात; कारण हे भक्तीला भाळणारे प्रभू भजणाऱ्यावर अनुग्रह करातात.११३. 'या कलियुगांत भगवंताच्या विभूतिरूप बहुतेक देवता निद्रित असतात; यासाठी या साक्षात् भगवंताची - श्रीगुरूंची, श्रद्धेने, सर्व संशय टाकून भक्ती कर.'११४. हे सिद्धमुनींचे वचन मानून नामधारकाने संशयरहित होऊन उपासना केली आणि त्या सद्गुरूंच्या गुणश्रवणाने तो लवकरच मोक्ष पावला.११५.

**तत्संवादमयं ग्रन्थं धर्म्यं गङ्गाधरात्मजः । सच्छ्रीगुरुचरित्राख्यं व्यरचत्तारकं सुधीः ।।११६।।**
**यत्र क्वापि स्थापितः प्रेतभूत-रक्षोमुख्यासद्ग्रहार्तिघ्न एषः ।**
**सप्ताहं तत्पाठिने शृण्वतेऽपि दत्तात्रेयोऽभीष्टकामान् ददाति ।।११७।।**
**स एवात्रेयगोत्रोत्थ-गणेशब्रह्मपुत्रगाम् । पुनानोऽर्थ्यो जयत्यत्र ग्रन्थात्मा तारकोऽव्ययः ।।११८।।**

सुधीः गङ्गाधर+आत्मजः तत्+संवाद+मयं धर्म्यं तारकं सत् श्रीगुरुचरित्र+आख्यं ग्रंथं व्यरचत्।११६। एषः यत्र क्व अपि स्थापितः प्रेत+भूत+मुख्य+असत्+ग्रह+आर्तिघ्नः। सप्त+अहं तत् पाठिने शृण्वते अपि दत्तात्रेयः अभीष्ट कामान् ददाति।११७। सः एव अर्थ्यः तारकः अव्ययः ग्रन्थ+आत्मा आत्रेय+गोत्र+उत्थ+गणेश+पुत्र+गां पुनानः अत्र जयति।११८।

त्यांच्या - सिद्ध आणि नामधारक यांच्या, संवादरूप ओवीबद्ध श्रीगुरुचरित्र नावाचा धर्मप्रद ग्रंथ गंगाधरपुत्र सरस्वती यांनी मराठीत रचलेला आहे.११६. हा ग्रंथ जिथे कुठे केवळ ठेवलेलाही असला तरी भूत, प्रेत आदि दुष्ट ग्रहांची पीडा दूर होते. ह्या ग्रंथाचे सात दिवसांचे पठण अथवा श्रवण करणाऱ्याच्या अभीष्ट कामना श्रीदत्तप्रभू पूर्ण करतात.११७. तोच तारक, अविनाशी, पुरुषार्थप्रद ग्रंथस्वरूपी दत्तात्रेय आत्रेय गोत्रोत्पन्न ब्राह्मण गणेशाचा पुत्र वासुदेव याच्या वाणीला पावन करीत इथेही भक्तोद्धाररूपी विजय मिळवीत आहे.११८.

हा अंतिम श्लोक मंगलाचरणात्मक आहे. टीकेमध्ये श्रीस्वामिमहाराजांनी आपल्या अलौकिक प्रतिभेने याचे विविध प्रकारे विवरण केले आहे.

**१. ॐकारपर (ब्रह्मपर) -** कठ उपनिषदानुसार (१:२:१५-१७) 'सर्व वेदांनी प्रतिपादलेले, सर्व तपस्यांत पुरस्कारलेले, ज्याच्या प्राप्तीसाठी साधक ब्रह्मचर्य धारण करतात' अशा शब्दांत सर्व उपासकांसाठी सर्वश्रेष्ठ प्रतीक आणि आलंबन म्हणून **ॐ**काराचे प्रतिपादन केले आहे.

**ॐ नमो भगवन्विश्व-हेतो ब्रह्मोडिताज ते । मालीनो विश्वभृल्लीलाविहार्यस्यार्यभावनः ।।११९।।**

**इति श्रीगुरुचरिते भक्तियोगे पञ्चमोऽध्यायः । आदितस्त्रयोविंशोऽध्यायः ।।२३।।**

ॐ भगवन् विश्व+हेतो, ब्रह्म+ईडित, अज, ते नमः। मालीनः विश्वभृत् लीला+विहारी आर्य+भावनः असि।११९।

तसेच ते ब्रह्माचे नाम असल्याने आणि नाम आणि नामी यांचा अभेद लोकप्रसिद्ध असल्याने; वस्तुतः ॐकार हा ब्रह्माचाच विवर्त असल्याने ते आपल्या अधिष्ठानाहून वेगळे नाही; ते ब्रह्माचे नावच असल्याने '*ब्रह्मदृष्टिरुत्कर्षत्वात्*' या न्यायाने ब्रह्म म्हणून उपास्य आहे. **ॐ** आपल्या उपासकांचे अविद्यादि अनर्थबीजांपासून रक्षण करते. '*ॐ इति ब्रह्म*' (तैत्तिरीय उ. १:८:१) 'हेच एक अक्षर ब्रह्म' (कठ उ. ८:२:१६) 'हेच खरोखर पर तसेच अपर ब्रह्म आहे' (प्रश्न उ. ५:२) श्रुतिवचनांनुसार त्या ब्रह्माचे संबोधन 'हे **ॐ**'. **भगवन् -** वेदांच्या पठणात प्रथम उच्चारले जाणारे पूजनीय अक्षर म्हणून त्याला भगवन् असे संबोधन केले आहे. जगद्रूपी पर्णशंकु (छां.उ. २:२३:३) ज्याच्या देठाच्या आश्रयाने स्थिर आहे त्या ब्रह्माशी तादात्म्य पावलेले नामधेय *ॐकार* हाच **विश्वहेतु**, जगताचे आदिकारण आहे. **ब्रह्म**णा म्हणजे वेदाने '*ॐमित्येकाक्षरम्*' अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोडित**. अकार हा सर्व वाचांचे मूळ असून सर्व व्यंजने आणि स्वर त्यांत सामावलेले आहेत (ऐतरेय आरण्यक २:३:६). त्यामुळे ॐकाराला **अज** ('अ'पासून झालेला) हे नाव सहजच आहे. किंवा **अ** म्हणजे ब्रह्मदेवाच्या कंठाला भेदून बाहेर पडलेला (अयोनिज) (बृहन्नारदीय पुराण १५११०) म्हणूनही ॐकाराला **अज** म्हणता येईल. **ते नमः** तुला नमस्कार असो. गायत्री इत्यादि जी ब्रह्मप्राप्तीची आलंबने आहेत त्यांत ॐकाराला श्रेष्ठ म्हटलेले आहे (कठ उ.१२१७; तैत्तिरीय. उ.१:४:१). सर्व आलंबनात आपल्या श्रेष्ठत्वाने शोभणारा असा **मालीनः**. अ, उ आणि म या तीन मात्रांनी स्थूल, सूक्ष्म आणि कारण या देहत्रयरूप विश्वाला पोसणारा म्हणून **विश्वभृत्**. या तीन मात्रांच्या उपासकांना पिप्पलादांनी शैब्याला सांगितल्याप्रमाणे (प्रश्न उ. ५) ऋक्, यजुः आणि साम या वेदांच्या द्वारा अनायासे लीलया त्या त्या लोकांना नेणारा तो **लीलाविहारी**. पंचीकरणाच्या

वार्तिकानुसार **आर्य** म्हणजे मुमुक्षूंना **भावयति** वाढवतो असा तो **आर्यभावन**. असा तू आहेस (**असि**).

**२. ईश्वरपर -** आपल्याला हवी असलेली वस्तू जर कुणाला मागायची असेल तर जसे आपण त्या व्यक्तीला त्याला अत्यंत आवडणाऱ्या नावाने हाक देतो तसेच ईश्वराला प्रणवाने - **ॐ**काराने साद देऊन स्तुती करतात. योगसूत्रानुसार (*तस्य वाचकः प्रणवः।* १:२७) आणि भ.गीतेनुसारही (*ॐ तत्सदिति निर्देशः ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।* १७:२३) हे देवाचे आवडते नाव आहे. '*उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम्। वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति।।*' या व्याख्येनुसार हे **भगवान्** ईश्वरा, तुला नमस्कार असो. तैत्तिरीय उपनिषदानुसार (*यतो वा इमानि भूतानिः..* ३:१) सर्व विश्वाचे आदिकारण म्हणून हे **विश्वहेतो**. जगाची सृष्टी करण्यापूर्वी ब्रह्मदेवाने ज्याची स्तुती केली तो तू **ब्रह्मोडित अजा**, तुला नमन असो (**ते नमः**). ज्याच्या ईक्षणमात्राने **मा** म्हणजे माया कार्यशील आहे; पण जो तिच्याने अस्पृष्ट - **अलीन** आहे, तो **मालीनः**. जगाच्या (*विश्व*) अध्यासाचे साक्षित्वाने भरण करतो (*भृत्*); किंवा '*फलमत उपपत्तेः।*' (ब्रह्मसूत्र ३:२:३८) या न्यायाने जगातील प्राणिमात्रांचे त्यांच्या त्यांच्या कर्माचे फळ देऊन पोषण करतो असा **विश्वभृत्**. विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय या लीलांनी विहरणारा **लीलाविहारी**. '*परित्राणाय साधूनां*' या भ.गीतेतील (४:८) प्रतिज्ञेनुसार साधूंचे - आर्यांचे संरक्षण करणारा **आर्यभावन** असा तू आहेस.

**३. शिवपर -** पुष्पदंताने शिवमहिम्नस्तोत्रात (२७) '*शरणद गृणात्योमिति पदम्*', रुद्राध्यायांत '*ॐ नम*', विभूति अनुवाकांत '*नमः सोमाय*', '*नमस्ताराय*' ह्याना अनुसरून **ॐ नमः भगवन्**. भव, मृड आणि शिव या तीन रूपांनी विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय करणारा (रुद्राध्याय १६:२८), ज्याच्यापासून जग उत्पन्न होते तो *भव*, रजगुणोपाधिक स्रष्टा; *मृडयति* सुखावतो तो *मृड*, सत्त्वगुणोपाधिक पालनकर्ता; हरण करणारा *हर*, तमोगुणोपाधिक संहारकर्ता; आणि विशुद्धसत्त्वगुणोपाधिक मोक्षाचा आनंद देणारा तो *शिव*. महिम्नस्तोत्राच्या ३०व्या श्लोकात हेच प्रतिपादन आहे. **ब्रह्म** म्हणजे वेदाने '*विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमान च यत् सर्वो ह्येष रुद्रः*' (तै.आरण्यक

१०:१६:१) अशी ज्याची स्तुती केली आहे तो **ब्रह्मोडित**. नररुंडाची माळ घालणारा (**माली**) सर्ववंद्य - ईश्वर (**इन**) तो **मालीनः**. '*या ते रुद्र शिवा तनू।*' (शु.यजु.वा.सं. १६:२) या श्रुतीनुसार शिव तनूने विश्वाचे पोषण करणारा (दुसरी घोर रुद्र तनू) तो **विश्वभृत्**. नंदीवर बसून तंत्राच्या उपकरणांनी श्मशानांत भूतांसह लीलेने विहरणारा **लीलाविहारी**. आर्यांना - पाशुपतांना जोपासणारा तो **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**४. नारायणपर -** हे **भगवन्** नारायण! नारायणाथर्वशिर उपनिषदानुसार 'नारायणापासूनच रुद्र जन्मतो, नारायणापासूनच प्रजा उपजते'; तसेच श्वेतश्वतर उपनिषदानुसार (६:१८) 'जो आधी ब्रह्मदेवाला उत्पन्न करतो' तो **विश्वहेतू**. '*विष्णुः नः कं वीर्याणि प्रवोचम्।*' (ऋग्वेद सं. १:१५४:१) असा वेदांनी स्तवलेला **ब्रह्मोडित**; ज्याचे कारण नाही असा **अज**; तुला वंदन असो (**ते नमः**). **मा** म्हणजे लक्ष्मी तिला छातीशी धरल्याने तिच्यात लीन झालेला (**मालीन**); कच्छरूपाने विश्व धारण करणारा **विश्वभृत्**; लीलेने अवतार धारण करून भक्तांवर अनुग्रह करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्य** म्हणजे वैष्णव, त्यांचे सालोक्यादि मुक्ती देऊन संवर्धन करतो तो **आर्यभावन**.

**५. ब्रह्मदेवपर -** एकाक्षरकोशानुसार (१) अकार म्हणजे विष्णू; भ.गीतेतही (१०:३३) *अक्षराणां अकारोऽस्मि* असे म्हटले आहे. तेव्हा **अ** म्हणजे विष्णूपासून झालेला तो **अज**. ऋग्वेदाने (१०:१२१:१) '*हिरण्गर्भः समवर्तताग्रे*' असा गौरविलेला आद्य शरीरधारी म्हणून पूज्य या अर्थाने **भगवन्**. वेदानुसार (ऋग्वेद स. १०:१९०:१३) 'धात्याने पूर्वीप्रमाणेच विश्व निर्माण केले,' म्हणून **विश्वहेतो**. सर्व लोक '**ब्रह्म**' म्हणून स्तवन करतात असा **ब्रह्मोडित**. **ते नमः।** मरीच्यादि मानसपुत्र ज्याला तपादींनी शोभा आणतात (*मालंते*) असा त्यांचा स्वामी (**इन**) **मालीनः**. ऋग्वेदानुसार (१०:१२१:१) 'जो ही पृथ्वी आणि स्वर्ग धारण करतो' म्हणून **विश्वभृत्**. लीलया जगदुत्पादनाची क्रिया हाच ज्याचा विहार आहे असा **लीलाविहारी**. **आर्यांना** - समुच्चयोपासकांना बल देणारा असा **आर्यभावन** तू आहेस (**असि**).

**६. अग्निपर -** 'त्याने आपले तीन भाग केले' या श्रुतीप्रमाणे (बृहदारण्यक उ. १:२:३) तोच वायू आणि

आदित्यरूपाने राहतो म्हणून **विश्वहेतो**; '**अ**' म्हणजे विराट् देह त्याच्या मुखापसून झालेला (ऋग्वेद सं.१०:९०:१३) तो **अज**; **ते नमः** तुला नमस्कार असो. वेदात (**ब्रह्मणि**) (ऋग्वेद १:१:२) 'अग्नी पूर्वीच्या ऋषींनी स्तवलेला आहे' म्हणून **ब्रह्मोडित**. तेजस्वी असल्याने **मालीनः**. जठराग्नीच्या रूपाने विश्वांतील प्राणिमात्राचे भरणपोषण करणारा **विश्वभृत्**. देवांचा दूत होऊन जो त्याना हवि पोचविण्याची क्रिया लीलेन पार पाडीत विहरतो तो **लीलाविहारी**. ईशोपनिषदांतील प्रार्थनेनुसार धर्मनिष्ठांना (**आर्यान्**) सुपथावर नेऊन त्यांचे संवर्धन करतो (**भावयति।**).

**७. वायुपर -** 'अतति' म्हणजे व्यापतो ते आकाश म्हणजेच **अः**; त्यापासून झालेला (तैत्तिरीय उ.२:१:१) **अजः**; तुला नमस्कार असो. प्रश्नोपनिषदात प्राणाच्या उपाधीने वायूचे विश्वहेतुत्व प्रतिपादलेले आहे. '*प्राणो ब्रह्मेति व्यजानात्*' या वचनाने तैत्तिरीय उपनिषदांत (३:३) शोभून दिसणारा **माली**; '*वायुर्वै गौतम तत्सूत्रम्*' (बृहदारण्यक उ. ३:७:२) यानुसार इंद्रियांचा प्रवर्तक आणि बलवान् असल्याने राजा (**इनः**); वृत्तींच्या द्वारा विश्वाचा पोषक (**विश्वभृत्**); प्राणोपासक **आर्यां**चे संवर्धन करणारा (**भावयति।**).

**८. सूर्यपर -** पुरुषसूक्तांत विराट पुरुषाच्या (**अः**) चक्षूंपासून झालेला म्हणून **अजः**; वेदत्रयीमय असल्याने **ॐ**कारस्वरूप; प्रातः माध्याह्न आणि सायं असा त्रिकाळ पूजिला जाणारा **भगवान्**; मैत्रायणी उपनिषदानुसार (६:३७) वृष्टी, अन्न आणि प्रजा या परंपरेने **विश्वहेतु**; तैत्तिरीय आरण्यकांत 'हा आदित्यच ब्रह्म आहे' अशी आणि ऋग्वेदांत (१:११५:१) सूर्याला जगताचा आणि त्यांतील सर्व जीवांचा आत्मा अशी त्याची स्तुती केल्याने **ब्रह्मोडित**; '**मा**' म्हणजे शोभा तिने '**अलति**' व्यापतो तो **मालीनः**; ऋग्वेदानुसार (३:५९:१) 'पृथ्वी आणि स्वर्ग यांना आधार देणारा' **विश्वभृत्**; लीलया प्रकाश करीत वरचेवर भ्रमण करीत विहरणारा **लीलाविहारी**; **आर्यां**ना म्हणजे गायत्रीचा जप करणाऱ्यांचा पोषक **आर्यभावन**.

**९. रामपर -** अज म्हणजे रघूचा पुत्र, त्याच्या गोत्रांत जन्मलेला **आज** म्हणजे रामचंद्रप्रभू. राक्षसांचे निर्दलन केल्याने

**विश्वहेतु**; प्रथम भूमीवर अवतरण्यासाठी व नंतर रावणवधाप्रीत्यर्थ ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**; **मा** म्हणजे माया अर्थात् सीता, तिच्यात **लीन** म्हणजे (स्त्रियांत आसक्त होण्याचे परिणाम लोकांत प्रदर्शिण्यासाठी) आसक्त तो **मालीन**. तिच्यासाठीच राक्षसांचे निर्दलन केले. धर्मस्थापनेने विश्वाचा सांभाळ केला म्हणून **विश्वभृत्**. लीलेने क्षत्रिय रूप घेऊन विहरणारा **लीलाविहारी**. बिभीषण, सुग्रीव, हनुमान अत्यादि आर्यांचासंवर्धक अर्थात् **आर्यभावन**.

**१०. कृष्णपर -** श्रीमद्भागवताच्या उक्तीप्रमाणे '*कृष्णस्तु **भगवान्** स्वयम्।*' (१:३:२८). '*अजोऽपि सन्नव्ययात्मा*' ह्या गीतोक्तीनुसार **अज**. गीतेत (९:४) त्यांनीच '*मया ततमिदं सर्वं जगत्*' असे सांगितल्याप्रमाणे **विश्वहेतु**. ब्रह्मदेवाचा गर्वपरिहार केल्यावर त्याने स्तुती केलेला **ब्रह्मोडित**. वन**माली** तर तो आहेच. **इनः** म्हणजे क्षत्रिय. दैत्यांचा निग्रह करून विश्वाचे रक्षण करणारा **विश्वभृत्**. वृंदावनांत गोपींसह व द्वारकेत सोळा हजार स्त्रियांसह विलास करणारा गोपांसह क्रीडा आणि अर्जुनाचे सारथ्य अशा **लीला** करीत **विहर**णारा. आर्य म्हणजे यादव त्यांचा रक्षणकर्ता म्हणून **आर्यभावन**.

**११. गणपतिपर -** *अजा*चा म्हणजे शिवाचा पुत्र **आजः**; अथर्वशीर्षात '*सर्वं जगदिदं त्वत्तो जायते*' असा स्तवलेला **विश्वहेतु**. निर्विघ्नतेसाठी ब्रह्मदेवाने स्तवलेला **ब्रह्मोडित**. प्रवालांच्या माळा घालणारा **माली**. विघ्नांचा **इन** (राजा). लीलेने नरगजरूपाने विहरणारा **लीलाविहारी**. गाणपत्यांचा (आर्यांचा) पोषक **आर्यभावन**.

**१२. देवीपर -** देवीच्या संदर्भांत या सर्व विशेषणांच्या स्त्रीलिंगी रूपांची योजना करावी. ***ॐ भगवती विश्वहेतुः ब्रह्मोडिता, अजा ते नमः। मालिनी विश्वभृता लीलाविहारिणी आर्यभावना असि।***

**श्रीदत्तपर -** *अज* म्हणजे ब्रह्मदेवाचा नातू **आजः**. '*ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना।।*' या व्याख्येनुसार जो संपूर्ण ऐश्वर्य, संपूर्ण धर्म, संपूर्ण यश, समग्र श्री, समग्र वैराग्य आणि समग्र मोक्ष यांनी युक्त आहे असा **भगवान्**. दत्तोपनिषदानुसार 'जो विश्वाची निर्मिती करतो आणि विश्वाचा सांभाळ

करतो’ तो **विश्वहेतु** आणि **विश्वभृत्**. योगेश्वर या अर्थाने, *मा* म्हणजे *माया* तिच्यांत *अलीन* अनासक्त म्हणून **मालीन**. लीलेने अवधूतवेष घेऊन गंगास्नानादी विहार करणारा **लीलाविहारी**. भक्ताचे पालन करणारा **आर्यभावन**. तापिनी उपनिषदांत भगवान विष्णूंनी ब्रह्मदेवाला ‘दत्तात्रेय नावाच्या माझ्या सात्त्विक रूपाची उपासना कर,’ असे सांगितले आहे. तसेच शांडिल्याला अथर्वणाने ‘*शांतं आत्मप्रकाशं दत्तं ध्यायमान*’ असे सांगितले आहे. त्यावरून दत्तच परब्रह्म आहेत. ‘याप्रमाणे श्रीगुरूंच्या प्रेरणेने यथामती विवेचन केले.’

ग्रंथाच्या आरंभी गुरुस्तुतीच्या पहिल्या श्लोकात श्रीविष्णू, शिव, गणेश, सूर्य, शक्ती इत्यादि रूपे घेणाऱ्या सद्गुरू दत्तात्रेयाचे प्रतिपादन केले. अंती मंगलाचरणाच्या या श्लोकात बारा मुख्य देवतांची आणि दत्तप्रभूंची स्तुती एकाच श्लोकाने करून त्या सर्वांचा अभेद सिद्ध करून श्रीदत्तप्रभूच परब्रह्म आहेत हा सिद्धांत प्रस्थापित करून समारोप केला आहे. यात उपक्रम आणि उपसंहार यांची एकवाक्यता दिसून येते आणि श्रीदत्तप्रभू हेच या ग्रंथाचे तात्पर्य आहेत हे निरपवाद सिद्ध होते.

**संहितेऽयं द्विसाहस्री त्रिकांडाभीष्टदा सती। व्याख्याताऽजोऽनया प्रीयाच्छ्रीदत्तोऽयं त्र्यधीश्वराः।।**

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथाचा भक्तियोगाचा पाचवा आणि प्रथमपासून तेविसावा अध्याय इथे पूर्ण झाला. तो श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ योगरहस्य ।।

**श्रेष्ठपुंजन्मसाफल्यं कार्यं योगत्रयाश्रयात् । समाख्यातद्विसाहस्री-संहितासंग्रहस्त्वयम् ।।१।।**
**भक्तिं विना न साफल्यं कर्मणः कर्मणा विना । न च ज्ञानं विना ज्ञानान् न मोक्षो यस्य कस्यचित् ।।२।।**
**न ज्ञानं जीवति प्राणे मनस्यपि लयं नयेत् । यस्तौ गच्छति मोक्षं स योगी नान्यः कथंचन ।।३।।**

श्रेष्ठ+पुं+जन्म+साफल्यं योग+त्रय+आश्रयात् कार्यम्। अयं समाख्यात+द्वि+साहस्री+संहिता+संग्रहः।१। भक्तिं विना कर्मणः साफल्यं न। कर्मणा विना च ज्ञानं न। विना ज्ञानात् यस्य+कस्य+चित् मोक्षः न।२। जीवति प्राणे, मनसि अपि, ज्ञानं न। यः तौ लयं नयेत् सः योगी मोक्षं गच्छति। अन्यः कथंचन न।३।

श्रेष्ठ अशा नरजन्माचे साफल्य करावयाचे असेल तर ज्ञान, कर्म व भक्ती अशा तीनही योगांचा आश्रय करावा लागेल, हाच आतापर्यंत सांगितलेल्या द्विसाहस्री संहितेचा सारभूत अर्थ आहे. या संहितेत पहिल्या तेरा अध्यायांत ज्ञानयोगाचे, पुढच्या पाच अध्यायांत कर्मयोगाचे आणि अंतिम पाच अध्यायांत भक्तियोगाचे निरूपण आहे. चौदाव्या अध्यायाच्या आरंभी टीकेत ज्ञानयोगाचा अधिकार येण्यासाठी कर्मयोगाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. तसेच एकोणिसाव्या अध्यायाच्या सुरुवातीला ज्यांचे चित्त शुद्ध झाले आहे त्यांना ध्यानसिद्धीकरिता भक्तियोग सांगितला आहे. प.पू. श्रीयोगिराज गुळवणीमहाराज आपल्या योगरहस्यावरील टीकेत म्हणतात, 'याप्रमाणे वेदप्रमाणसिद्ध कर्मयोग, त्यातील न्यूनाधिकत्व दोष दूर करून त्याची पूर्णता करणारा भक्तियोग व या दोहोंचेही फल असणारा मोक्षदायक ज्ञानयोग हे तीनही योग आपल्या ठिकाणी स्थिर होण्याकरिता प्रयत्नशील राहणे हेच मनुष्य जन्माचे खरे साफल्य आहे आणि द्विसाहस्रीसहितेचा हाच सारांश आहे. असे या प्रथम लोकात श्रीमहाराजांनी सांगितले आहे.'१. भक्तीवांचून कर्माचे फळ मिळत नाही; कर्माशिवाय ज्ञान होत नाही आणि ज्ञानावाचून कुणाचाही मोक्ष होत नाही.

**चले प्राणे चलं चित्तं निश्चले निश्चलं तयोः । नष्ट एकतरे नाशो द्वयोरपि स योगतः ।।४।।**

चले प्राणे चित्तं चलम्। निश्चले निश्चलम्। तयोः एकतरे नष्टे द्वयोः अपि नाशः। सः योगतः (भवति)।४।

ज्ञानाशिवाय मोक्ष नाही हे वेदांताचा प्रमुख सिद्धांत आहे. त्याचा विचार पुढे बोधरहस्यात येणारच आहे. कर्मयोग म्हणजे वर्णाश्रमानुसार आपल्याला विहित असलेले कर्म करणे. गीतेच्या '*यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं तम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः।।१८:४६।।*' संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, '*म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे, तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आली। आकाश भूतें।।१४।।*' ज्ञानासाठी जसे कर्म आवश्यक आहे तसेच ते चित्तशुद्धीद्वारा भक्तीच्या प्रादुर्भावासाठीही आवश्यक आहे. या अभिप्रायानेच श्रीमहाराज म्हणतात की भक्तीशिवाय कर्माचे साफल्य नाही.२.

प्राण आणि मन जोवर जीवित आहेत तोवर ज्ञान होणार नाही असा सिद्धांत इथे श्रीस्वामिमहाराजांनी मांडला आहे. प्राणाचे जीवन म्हणजे इडा आणि पिंगला या नाड्यांतून (डाव्या आणि उजव्या नाकपुड्यांतून) प्राणाचे वहन. तसेच मनाचे जीवन म्हणजे संकल्प. यो दोन्हींचा जो लय करतो, या दोन्हींचा निरोध करतो तोच योगी मोक्ष पावतो. अन्य कुणीही नाही. वैद्यकशास्त्राच्या सिद्धांतानुसार श्वासोच्छ्वासरूपी प्राणाचे संचलन थांबणे हे मृत्यूचे लक्षण आहे. पण योगात हे मृत्यूशिवायही शक्य आहे. त्याचप्रमाणे 'आपापल्या विषयांचे ग्रहण इंद्रियांचे जीवन आहे; सतत नाना प्रकारचे संकल्प-विकल्प करून विविध वृत्ती उठवणे हे मनाचे जीवन आहे. त्यांचा निरोध इथे विवक्षित आहे. प्राण किंवा मन यांचा स्वरूपनाश नाही.' (हठयोगप्रदीपिका टीका ४:१५). योगशास्त्रानुसार ब्रह्मरंध्रात (मस्तकात) प्राणाची निश्चल स्थिती हाच प्राणाचा लय. तसेच इतर विषयांपासून निवृत्त ध्येयाकार होऊन स्थिरावणे हा मनाचा लय होय. मूर्छा किंवा झोप यांपेक्षा ही वेगळी अवस्था आहे.३.

**भक्तिक्रियाज्ञानयोगान् मुक्तिरुक्तापि तत् त्रयम् । ज्ञेयं साष्टाङ्गयोगान्तर्गतं द्वैधमतोऽत्र नो ।।५।।**

भक्ति+क्रिया+ज्ञान+ योगात् मुक्तिः उक्ता। तत् त्रयं स+अष्ट+अङ्ग+योग+अन्तः+गतम्। ततः अत्र द्वैधं नो।५।

**अष्टांगयोगांत तीनही योगांचा अंतर्भाव.** प्राण चालतो तोपर्यंत चित्तही (मन) चालते. या दोन्हींपैकी एक स्थिर झाले की दुसरेही थांबते. असे प्राण आणि मन परस्परांशी निगडित आहेत. या दोन्हींचे स्थैर्य संपादन करण्यासाठी योगाची आवश्यकता इथे महाराजांनी प्रतिपादिली आहे. हीच योगाची व्याख्याही होते. पतंजलींच्या व्याख्येतला '*चित्तवृत्तिनिरोधः*' यात समाविष्टच आहे. आत्मज्ञानासाठी म्हणजेच मोक्षासाठी योगाची आवश्यकता प्रतिपादणारी वचने वेद-शास्त्र-पुराणे यांतून प्रचुर आहेत. त्यांचा निर्देश इथे विस्तारभयाने करता येत नाही. श्रीस्वामिमहाराजांनी श्रीदत्तपुराणांत (२:२:१-२) सांगितल्याप्रमाणे 'सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्री-पुरुष, बाल, युवा, वृद्ध यांना योगाभ्यासाचा अधिकार आहे. आणि त्यानी अभ्यास केला तर ते सिद्धीही प्राप्त करू शकतात.'४. श्रीमद्भागवतात उद्धवगीतेत (११.२०.६) '*योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया। ज्ञानं कर्म च भक्तिश्च नान्योपायोऽस्ति कर्हिचित।।*' असे प्रतिपादन केलेले आहे. या तीन्हींपेक्षा वेगळा योगच हा मोक्षाला उपाय कसा ठरतो? या आक्षेपाच्या समाधानासाठी श्रीमहाराज सांगतात, 'हे तीनही उपाय अष्टांगयोगात अंतर्भूत आहेत. त्यामुळे इथे कांही विरोधाचा प्रश्नच येत नाही.' यापैकी योगाचे आचार्य पतंजली यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी अशी योगांची आठ अंगे सांगितली आहेत. संप्रज्ञात समाधी हा आठ अंगांपैकी शेवटचे अंग असून यांचा अंगी जो योग तो म्हणजे असंप्रज्ञात समाधी होय. त्यांपैकी **नियम** या अंगाची व्याख्या करणारे सूत्र '*शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः*।२:३२।' यांपैकी तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या तिघांचे पतंजलींनी **क्रियायोग** असे वेगळे वर्गीकरण केले आहे (२:१). उपवास, कृच्छ्र, चांद्रायणादि व्रतांनी शरीर झिजवणे म्हणजे **तप**. उपनिषत्, शतरुद्रीय, प्रणव इत्यादिकांचा जप म्हणजे स्वाध्याय आणि नवविधा भक्ती म्हणजे **ईश्वरप्रणिधान**. **स्वाध्याय** या नियमात मोक्षाच्या साधनांचा अभ्यास समाविष्ट आहे. हेच ज्ञानयोगातील श्रवण आणि मनन होत. ज्ञानयोगाचा

**नात्यश्नतोऽनश्नतोऽति-सुप्तस्यैष न जाग्रतः । युक्तचेष्टाहारनिद्रा-गतेर्योगो भवेत्सुखः ।।६।।**

न अति+अश्नतः, न अन्+अश्नतः, (न)अति+सुप्तस्य, न जाग्रतः (योगो भवेत्)। युक्त+चेष्टा+आहार+निद्रा+गतेः सुखः योगः भवेत्।६।

तिसरा भाग निदिध्यासन तो योगाच्या **ध्यान** या अंगाशी समानार्थक आहे. याच क्रियायोगात कर्मयोग आणि भक्तियोग यांचाही अंतर्भाव आहे. ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम कर्मानुष्ठान म्हणजे कर्मयोग. श्रवण, कीर्तन इत्यादि नवविधा भक्तीला साधन भक्ती म्हणतात. दुसरी फलरूप भक्ती म्हणजे ईश्वराविषयी प्रेम. 'ईश्वरचरणाविषयी अंतःकरणात उत्पन्न झालेला निर्व्याज, अव्यभिचारी असा अविच्छिन्न प्रेमप्रवाह म्हणजे प्रेमभक्ती. अशी नारायणतीर्थांची व्याख्या आहे. चित्त प्रेमार्द्र होऊन ईश्वराकार होणे म्हणजे प्रेमभक्ती असे मधुसूदन-सरस्वती म्हणतात.' ही भक्ती अष्टांगयोगातली संप्रज्ञात समाधीच आहे असे भक्तिशास्त्रकार मानतात. १९व्या अध्यायाच्या ३ऱ्या श्लोकात हा विचार श्रीमहाराजांनी मांडलेला आहे. तो पुन्हा वाचण्यासारखा आहे. या श्लोकातील तीनही मोक्षोपाय योगात अंतर्भूत आहेत असे म्हणताना श्रीस्वामिमहाराजांची समन्वयात्मक दृष्टी समजून घेतली नाही तर योग आणि इतर साधने यांचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व असा कदाचित् वाद उद्भवू शकतो. तीनही मोक्षाचे मार्ग परस्परपूरक आहेत आणि त्यांच्यात कांहीच विरोध नाही हा खरा या श्लोकाचा आशय आहे. प.पू. योगिराजांनी म्हटल्याप्रमाणे, 'कोणत्याही प्रकारे अभिनिवेश न ठेवता ईश्वरस्मरणपूर्वक आपापले साधन निष्ठेने करून साधकाने आत्मकल्याण साधण्याकडे विशेष लक्ष द्यावे.'५.

या श्लोकात आहारविहारादींचे नियमन सांगितले आहे.

**आहार** फार जास्ती किंवा फार कमी नसावा. आवश्यक आणि मानवेल तेवढाच आहार घ्यावा. कमी घेतला तर शरीर आणि मन अशक्त होईल व अभ्यासाला साथ देणार नाही. जास्त घेतला तर आळस, झोप आणि रोग यांना आमंत्रण दिल्यासारखे होईल. '*अर्धमानस्य सव्यञ्जनस्य तृतीयमुदकस्य तु। वायोः संचरणार्थाय चतुर्थमवशेषयेत्।।*' अगदी पोटभर जेवू नये. अर्धे पोट भरेल एवढेच अन्न घ्यावे.

**तस्माद्वैराग्यतोऽभ्यासं गुरोरग्रे वितन्वतः । योगस्य प्राप्य संसिद्धिं विद्वान्मुक्तो भवेद्द्रुतम् ।।७।।**

तस्मात् वैराग्यतः गुरोः अग्रे अभ्यासं वितन्वतः योगस्य संसिद्धिं प्राप्य विद्वान् द्रुतं मुक्तः भवेत्।७।

चौथा भाग पाणी प्यावे आणि उरलेला चौथा भाग वायूच्या संचरणाला रिक्त ठेवावा असे भारतीय आहारशास्त्र सांगते. आहारही आश्रमानुसार अधिक-उणा करावा असे स्मृतिग्रंथांत सांगितले आहे. *'अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः षोडशारण्यवासिनः। द्वात्रिंशत्तु गृहस्थस्य यथेष्टं ब्रह्मचारिणाम्।।'* संन्याशाने आठ घास (तोंड फार न पसरता), वानप्रस्थाने सोळा, गृहस्थाने बत्तीस तर ब्रह्मचाऱ्याने कितीही घास घ्यावेत. युक्त आहार यात आहाराच्या पावित्र्याचाही विचार अपेक्षित आहे. शुचितेने सिद्ध केलेला, देवाला अर्पण केलेला, मित (मोजका) आणि सात्त्विक आहार घ्यावा.

**निद्रा**सुद्धा योग्यच प्रमाणात घेतली पाहिजे. रात्री उशीरा झोपणे आणि सकाळी उशीरा उठणे हे शरीराला वा मनालाही हितावह नाही. सूर्यास्तानंतर ३-४ तासांनी झोपावे व सूर्यास्तापूर्वी एक-दीड तास आधी उठावे असा सर्वसाधारण नियम आहे. अधिक कार्यमग्नता, अधिक हालचाल आणि अधिक प्रवास हे योगाभ्यासाला बाधक आहेत.

*'अत्याहारः प्रयासच प्रजल्पो नियमग्रहः। जनसंगश्च लौल्यंच षड्भिर्योगो विनश्यति।। उत्साहात्साहसाद्धैर्यात्तत्वज्ञानाच्च निश्चयात्। जनसंगपरित्यागात्षड्भिर्योगः प्रसिद्ध्यति।।'* अधिक आहार, अतिश्रम, अतिबडबड, उपवास, फलाहार इत्यादि नियम धरणे, लोकांत जास्ती वावरणे आणि कामासक्ती ह्या सहा गोष्टी योगाला बाधक आहेत. मी चित्त स्थिर करीनच असा उत्साह, साध्य-असाध्य हा विचार दूर सारून साधनाकडे प्रवृत्त होणे हे साहस; यावज्जीव प्रयत्न करीत राहणे, कधीही खिन्न न होणे हे **धैर्य**; संपूर्ण दृश्य विषय, मृगजळाप्रमाणे आभासमात्र अस्थिर आहेत, फक्त परमात्माच स्थिर आहे ही दृढबुद्धी म्हणजे **तत्त्वज्ञान**; शास्त्राचे व गुरूंचे सांगणे पूर्णपणे खरे आहे असा विश्वासरूप **निश्चय**; योगाभ्यासाला प्रतिकूल अशा विषयासक्त **लोकांच्या संगतीचा त्याग**; या सहा गुणांनी योगाची फलसिद्धी होते.६.

**क्षाराम्लतिक्तकटुरुक्षकदन्नशाक-स्त्र्यग्न्यध्वभाङ् न लभतेऽकुशलोऽस्य सिद्धिम् ।**
**शुण्ठीसितासुमनशालिसदन्नमुद्ग-चक्षुष्यशाकघृतदुग्धसदम्बु पथ्यम् ॥८॥**

क्षार+अम्ल+तिक्त+कटु+रुक्ष+कदन्न+शाक+स्त्री+अग्नि+अध्व+भाक् अकुशलः अस्य सिद्धिं न लभेत्। शुण्ठी+सिता+सुमन+शालि+सत्+अन्नम् उद्ग+चक्षुष्य+शाक+ घृत+दुग्ध+सत्+अम्बु पथ्यम्।८।

वैराग्यपूर्वक गुरूच्या दृष्टीसमोर अभ्यास करणाऱ्या साधकाला, योगाची फलसिद्धी प्राप्त होऊन, तो आत्मज्ञान संपन्न होतो व शीघ्र मुक्त होतो.७. खारट, आंबट, कडू, तिखट, स्निग्ध नसलेले जोधळे, उडीद इत्यादि धान्य, आणि प्रायः सर्व भाज्या असे पदार्थ, विशेष आवडीने खाणारा, स्त्रीसंग करणारा कामातुर, अग्नीजवळ बराच वेळ शेकत बसणारा, नेहेमी पायी प्रवास करणारा आणि अभ्यासात हुषारी नसणारा, अशा मनुष्याला योगाची फलसिद्धी प्राप्त होत नाही. सुंठ, साखर, गहू, तांदूळ, वरई, सावे, मूग, डोळ्याला हितकारक अशा भाज्या, तूप, दूध, उत्तम शुद्ध पाणी हे सर्व योगाभ्यास करणाऱ्याला पथ्यरूप हितावह असे आहे. बहुतेक सर्वच शाका (पालेभाज्या) डोळ्यांना हितावह नाहीत. चक्षुषी म्हणजे डोळ्यांना हितावह अशा पाच भाज्या टीकेत श्रीस्वामिमहाराजांनी दिल्या आहेत. त्यांची नावे संस्कृत व कंसांत हिन्दी दिली आहेत. जीवन्ती (जीयाति, हरणवेल, हरणदोडा), वास्तु (हेतुया, बथुवा, चंदनबथुवा), मत्स्याक्षी (छछमछरी, मछेछी, सोमवल्लरी), मेघनादा(मा) (चवराई, मोथ) म्हणजे चवळी, पुनर्नवा (करला, घेटुळी). अष्टांगमिथुनाने स्त्रीसेवन, शेकण्याने अग्निसेवन, प्रवासाने अध्वसेवन ही योगाभ्यासाला प्रतिकूल आहेत.८.

**सद्देशे मठिकामध्ये निश्चिन्तो गुरुशिक्षितः । कुशाजिनांशुकेष्वेव हठयोगं समभ्यसेत् ।।९।।**
**गुदमेण्ढ्रोर्ध्वस्थगुल्फमासीनो यतगुः समः । भ्रूमध्यदृग्वान्यपीठैः सिद्धं तत्राप्यदोऽस्ति सत् ।।१०।।**

सत्+देशे, मठिका+मध्ये निश्चिन्तः गुरु+शिक्षितः कुश+अजिन+अंकुशेषु एव हठयोगं समभ्यसेत्।९। गुद+मेण्ढ्र+ऊर्ध्व+गुल्फ+आसीनः यत+गुः समः वा अन्य+पीठैः। अदः सिद्धं तत्र अपि सत् अस्ति।१०।

योगाभ्यासाचे स्थान पवित्र असावे. याविषयी हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे, '*सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे। धनुः प्रमाणपर्यन्त शिलाग्निजडवर्जिते।। एकान्ते मठिकामध्ये स्थातव्यं हठयोगिना।।* हठयोगप्रदीपिका १:१२।।' ज्ञानेश्वरीत ६व्या अध्यायात ११व्या श्लोकावरील भाष्य वाचण्यासारखे आहे. एखाद्या छोट्याशा झोपडीत, दर्भासनावर कृष्णाजिन आणि त्यावर स्वच्छ धुतलेले वस्त्र अशा आसनावर बसावे. निश्चिंत या शब्दाने प्रापंचिक विवंचनापासून शक्य तो दूर राहण्यास सुचविले आहे. हठयोगाचा निर्देश इथे केला आहे. याची व्याख्या टीकेत अशी केली आहे. 'हकार' म्हणजे सूर्य म्हणजेच प्राण आणि 'ठकार' म्हणजे चंद्र अर्थात् अपान. त्या दोहोंचा - प्राण आणि अपान यांचा योग म्हणजे हठयोग.

ह्या हठयोगाचा अभ्यास गुरूंच्या मार्गदर्शनाखालीच करावा हे **गुरुशिक्षितः** या शब्दाने सुचविले आहे. ही सूचना अतिशय महत्त्वपूर्ण आहे. पुढे सांगितलेला योगाभ्यास पुस्तकात वाचून करण्यात धोका आहे. **विद्वान् आणि अनुभवसंपन्न गुरूंच्या उपस्थितीतच हा अभ्यास केला पाहिजे**.९. गुद आणि वृषण यांच्यामध्ये असलेल्या शिवणीवर एका पायाची टाच व शिश्नाच्या वर दुसरी टाच ठेवून, इंद्रियांचा निग्रह करून व दृष्टी भ्रूमध्यावर स्थिर करून बसल्याने सिद्धासन होते. ह्या किंवा इतर आसनावर बसावे. पण हे सिद्धासनच सर्व आसनात श्रेष्ठ आहे. ह्या आसनाच्या अभ्यासाने मूलबंध, उड्डियान बंध व जालंधर बंध हे तीनही अनायास लागतात आणि साधक उन्मनी अवस्थत जातो. (हठयोगप्रदीपिका १:४२) बारा वर्षे सिद्धासनाचा अभ्यास केल्याने योगसिद्धी प्राप्त होते.१०.

**वायुं शक्त्येडयापूर्य हृदि स्थाप्य हनुं जपन् । हंसं शक्त्या कुम्भयित्वा पश्चादाकर्षितोदरः ।।११।।**
**शनैर्विरेचयेदेष प्राणायामः सुसिद्धिदः । पञ्चर्ध्याह्न्यह्न्यशीत्यन्तैः प्रतिसन्ध्यसुयामकैः ।।१२।।**
**गन्तव्यमार्गस्थशक्ति-चालनाद् भस्रया भवेत् । नाडीशुद्धिस्त्रिमासोर्ध्वं प्राणो याति लयं सहृत् ।।१३।।**

वायुं शक्त्या ईडया आपूर्य हनुं हृदि स्थाप्य हंसं जपन् शक्त्या कुम्भयित्वा, पश्चात् आकर्षित+उदरः।११। शनैः विरेचयेत्। एष प्राणायामः सु+सिद्धि+दः। अह्नि अह्नि पंच+ऋध्या अशीति+अन्त्यैः प्रति+सन्धि+असु+यामकैः।१२। भस्रया गन्तव्य+मार्गस्थ+शक्ति+चालनात् त्रि+मास+ऊर्ध्वं नाडी+शुद्धिः भवेत्। प्राणः सहृत् लयं याति।१३।

शक्तीप्रमाणे डाव्या नाकपुडीने वायू आत घेऊन म्हणजे **पूरक** करून, हृदयावर हनुवटी ठेवून गायत्री-मंत्र किंवा सोहंमंत्र यांचा मानसिक जप करीत राहून, शक्तीप्रमाणे **कुंभक** करून, नंतर आपले पोट आत ओढून(११) साधकाने तो वायू हळूहळू उजव्या नाकपुडीने बाहेर सोडावा म्हणजे **रेचक** करावा. हा पूरक, कुंभक व रेचक मिळून एक प्राणायाम होतो. तो उत्तम सिद्धी देणारा आहे. असे प्राणायाम प्रतिदिवशी त्रिकाल करावेत व ते पाच पाच या प्रमाणाने वाढवून ऐंशीपर्यंत न्यावेत.१२. तसेच, पुढे सांगितलेली भस्रिका व प्राणवायूच्या गमनाला योग्य अशा सुषुम्णा मार्गांतील शक्तीचे चालन करावे. याप्रमाणे प्राणायाम, भस्रिका व शक्तिचालन या तीन साधनांच्या अभ्यासाने तीन महिन्यांनंतर सर्व नाड्यांची शुद्धी होते आणि प्राणवायू चित्तासह विलीन होतो.१३. हा सुषुम्णेत प्रवेश केलेला प्राण ब्रह्मरंध्रात (टाळू) जाऊन तिथे दोन पळे आणि पाच विपळे (५० सेकंद) इतका वेळ स्थिर झाला की एक **प्राणायाम** होतो.१४. इथून हा काळ बारापट वाढत गेला की अनुक्रमे **प्रत्याहार** (१०मिनिटे), **धारणा** (दोन तास), **ध्यान** (चोवीस तास) आणि **समाधी** (बारा दिवस) सिद्ध होतात. बारा दिवसांची **समाधी** ही अत्यंत दुर्लभ आहे.१५.

**प्राणायाम** म्हणजे आपल्या शरीरात संचार करणारा जो **प्राण** नामक वायू आहे त्याचा **आयाम** म्हणजे निरोधन. याचे तीन प्रकार आहेत. शरीराबाहेरील वायू आत ओढून घेणे याला **पूरक** म्हणतात. तो कुंभ म्हणजे घागरीत भरल्यासारखा शरीरात धरून ठेवणे याला **कुंभक** म्हणतात. आणि तो वायू बाहेर सोडणे याला **रेचक** असे नाव आहे.

**लीनः सपञ्चविपल-द्विपलं सोऽसुयामकः । ब्रह्मरन्ध्रे वर्धमानः प्रत्याहारादयः स तु ।।१४।।**

स+पञ्च+विपलं+द्विपलं ब्रह्मरंध्रे लीनः सः असु+यामकः। सः वर्धमानः तु प्रत्याहार+आदयः।१४।

बहुतेक कुंभक पूरकानंतर केले जातात. त्यांना पूरकपूर्वक कुंभक म्हणतात. सूर्यभेदन, उज्जायी इत्यादि त्यांची उदाहरणे आहेत. रेचकानंतर प्राण बाहेरच अडवून धरणे ह्याला रेचकपूर्वक कुंभक (बहिःकुंभक) म्हणतात. रेचक किंवा पूरक न करता प्राण नाकपुड्यांतच धरून ठेवणे याला केवलकुंभक म्हणतात. ('*न रेचको नैव च पूरकोऽत्र नासापुटे संस्थितमेव वायुं। सुनिश्चलं धारयते क्रमेण कुंभाख्यमेतत्प्रवदन्ति तज्ज्ञाः।।*')

**प्राणायामाच्या श्रेणी -** प्राणायामाच्या श्रेणी त्याच्या कालावरून ठरतात. त्यासाठी मात्रा हे माप आहे. साधारणतः मनुष्य झोपलेला असताना त्याचा एक श्वासोच्छ्वास व्हायला लागणारा काळ म्हणजे मात्रा. हा काळ गुडघ्यावरून हात फिरवून एक चुटकी वाजवायला लागणाऱ्या काळाइतका स्कंद पुराणात सांगितला आहे. बारा मात्रांचा प्राणायाम साधारण, चोवीस मात्रांचा मध्यम आणि छत्तीस मात्रांचा उत्तम प्राणायाम होतो. साधारण प्राणायामाने घाम येतो, मध्यम प्राणायामाने शरीर कापते आणि उत्तम प्राणायामाने प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिरावतो.

प्राणायाम प्रातः, माध्याह्न, सायं आणि मध्यरात्री करावेत. मध्यरात्री करण्यास अशक्त असेल त्याने त्रिकाल करावेत. वर सांगितल्याप्रमाणे एका वेळी ऐंशी प्राणायाम केल्याने रोज २४० प्राणायाम होतात. तीन महिन्यांत २१६००, म्हणजे २४ तासांतील श्वासांच्या संख्येइतके प्राणायाम होतात. हे प्राणायामांचे एक पुरश्चरणच होते. याचे फळ नाडीशुद्धी हे सांगितले आहे. नाडीशुद्धीची लक्षणे हठयोगप्रदीपिकेत २ऱ्या उपदेशात पुढीलप्रमाणे दिली आहेत. '*यदा तु नाडीशुद्धिः स्यात्तदा चिन्हानि ब्राह्यतः। कायस्य कृशताकांतिस्तदा जायेत निश्चितम्।।१९।। यथेष्टधारणं वायोरनलस्य प्रदीपनम्।नादाभिव्यक्तिरारोग्यं जायते नाडिशोधनात।।२०।।*

**स्वकालद्वादशगुणोत्तरकालावधिः स्मृतः । समाधिर्द्वादशदिन-साध्यः परमदुर्लभः ।।१५।।**

स्वकाल+द्वादश+गुण+उत्तर+काल+अवधिः स्मृतः। समाधिः द्वादश+दिन+साध्यः परम+दुर्लभः।१५।

शरीर कृश परंतु तेजस्वी होणे, वायु कितीही वेळ धरून ठेवता येणे, जठराग्नी प्रदीप्त होणे, आपल्या शरीरांत अनाहत नाद ऐकू येणे आणि आरोग्य ही ती लक्षणे आहेत. प्राणायामाच्या पूर्वतयारीसाठी शरीरातील कफ, लठ्ठपणा इत्यादि दोषांच्या शुद्धीसाठी धौती, बस्ती, नेति, त्राटक, नौली आणि कपालभाति अशा **षट्क्रिया** हठयोगात सांगितल्या आहेत. याज्ञवल्क्यादी आचार्यांच्या मते हे दोष प्राणायामानेच दूर होतात. त्यामुळे श्रीमहाराजांनी इथे षट्क्रिया सांगितल्या नाहीत. कपालभाति पुढे सांगितली आहे.

**बंधत्रय -** पूरकानंतर हनुवटी छातीला टेकून कुंभक करावा असे जे वर सांगितले आहे त्या क्रियेला **जालंधरबंध** असे म्हणतात. (*कंठाकुंचनपूर्वकं चिबुकस्य हृदि स्थापनं जालधरबंधः।*३) कुंभकानंतर रेचकाच्या आधी पोट आत पाठीकडे ओढायला सांगितले आहे तो **उड्डियान बंध** होय. (*प्रयत्नविशेषेण नाभिप्रदेशस्य पृष्ठत आकर्षणमुड्डियानबंधः*) पूरकाच्या आधी **मूलबंध** (शिवणीवर टाचेने दाबून गुदद्वाराचे आकुंचन) केला जातो. (*पार्ष्णिभागेन (गुल्फयोरधः प्रदेशः) योनिस्थानसंपीडनपूर्वकं (योनिस्थानं गुदमेढ्रयोर्मध्यभागं) गुदस्याकुंचनं मूलबंधः*). पूरकाच्या आधी मूलबंध व नंतर जालंधरबंध केल्याने प्राण ब्रह्मनाडीत म्हणजेच सुषुम्णेत प्रवेश करतो असे हठयोगप्रदीपिकेत सांगितले आहे. *पूरकांते तु कर्तव्यो बंधो जालंधराभिधः। कुंभकान्ते रेचकादौ कर्तव्यस्तूड्डियानकः।। अधस्तात्कुंचनेनाशु कंठसंकोचने कृते । मध्ये पश्चिमतानेन स्यात्प्राणो ब्रह्मनाडिगः।।* (हठयोगप्रदीपिका २।४५-४६)

या तीन बंधांचे फळ **कुंडलिनी शक्तीचे जागरण** हे आहे. ब्रह्मनाडीत प्राणाचा प्रवेश त्याचाच संकेत देते. हठयोगप्रदीपिकेत याचे असे वर्णन आहे. *अपाने ऊर्ध्वगे जाते प्रयाते वन्हिमण्डलम्। तदाऽनलशिखा दीर्घा जायते वायुनाऽऽहता।।६६।। ततो यातो वन्ह्यपानौ प्राणमुष्णस्वरूपकम्। तेनात्यन्तप्रदीप्तस्तु ज्वलनो देहजस्थता।।६७।। तेन*

**समासीनो यतास्योऽन्तः-प्राणं दक्षिणया त्यजेत् । सारं लगति हृत्कण्ठ-कपोलावध्यसौ यथा ।।१६।।**
**लोहकारस्य भस्रावच्छक्त्याश्वापूर्य रेचयेत् । वामां मध्यानामिकाभ्यां धृत्वा जाते श्रमे विधेः ।।१७।।**
**पीत्वा प्राणं कुम्भयित्वा धृत्वाङ्गुष्ठेन दक्षिणम् । वामया रेचयेन्मन्दं तथाथ प्राग्वदाचरेत् ।।१८।।**
**द्विनाड्यभ्यासाद्यामार्धं शक्तिर्मार्गं ददात्यरम् । भस्रेयं सर्वदोषघ्नी रुक्पापघ्न्यपि सिद्धिदा ।।१९।।**

सं+आसीनः यत+आस्यः अन्तः+प्राणं दक्षिणया स+आरं त्यजेत् यथा असौ हृत्+कण्ठ+कपोल+अवधि लगति।१६। लोहकारस्य भस्रावत् शक्त्या आशु आपूर्य वामां मध्य+अनामिकाभ्यां धृत्वा रेचयेत्। विधेः श्रमे जाते..।१७। प्राणं पीत्वा अङ्गुष्ठेन दक्षिणं धृत्वा वामया मन्दं रेचयेत्। तथा अथ प्राक्+वत् आचरेत्।१८। द्वि+नाडी+अभ्यासात् शक्तिः अरं मार्गं ददाति। इयं भस्रा सर्व+दोष+घ्नी, रुक्+पाप+घ्नी अपि सिद्धि+दा।१९।

*कुण्डलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते। दण्डाहता भुजङ्गीव निःश्वस्य ऋजुतां व्रजेत्।।६८।। बिलं प्रविष्टेव ततो ब्रह्मनाड्यन्तरं व्रजेत्। तस्मान्नित्यं मूलबंधः कर्तव्यो योगाभिः सदा।।६९।।* (ह.यो.प्र. ३). मूलबंधाच्या अभ्यासाने ऊर्ध्वगामी झालेला अपानवायू वह्निमंडलात (मणिपूर चक्रांत) प्रविष्ट झाला की वायूने प्रेरित होऊन एक उंच अग्निशिखा निर्माण होते आणि देहस्थ अग्नी अत्यंत प्रदीप्त होतो. त्याने तापलेली कुंडलिनी जागते आणि आपली वक्रता सोडून काठीने मारलेल्या नागिणीसारखी सरळ आणि ताठ होते. मग सुषुम्णेच्या मुखात शिरून ब्रह्मनाडीत जाते.

**भस्रिका -** प्रथम समस्थितीत बसावे. समस्थिती म्हणजे सरळ पण ताणरहित. तोंड बंद करावे आणि फुप्फुसातला प्राणवायु हृदय, कंठ आणि गालाला लगटून लोहाराच्या भात्यासारखा आवाज करीत बाहेर सोडावा (रेचक करावा).१६. डावी नाकपुडी मधले बोट आणि अनामिका यांनी दाबून बंद करून उजव्या नाकपुडीने वायू वेगाने आवाज करीत आत घेऊन (पूरक), कुंभक न करता त्याच नाकपुडीने पुन्हा बाहेर सोडावा. असे भराभर पूरक व रेचक केल्यावर श्रम झाल्यावर(१७) पूरक करून अंगठ्याने उजवी नाकपुडी बंद करून डाव्या नाकपुडीने हळूहळू रेचक करावा. मग आधीच्यासारखेच भात्यासारखा आवाज करीत वेगाने रेचक आणि पूरक डाव्या नाकपुडीने करावेत.१८. दोन्ही नाड्यांनी

**शिश्ननाभ्यन्तस्थकन्दं सति वज्रासने पदौ । धृत्वा दृढं प्रपीड्यारं भस्रां सिद्धासनस्थितः ।।२०।।**
**समाकुञ्चितनाभिर्द्राक् कुर्याच्छक्तिश्चलत्यतः । यामार्धाभ्यासतो धैर्यान्मध्यनाड्यां समुद्गता ।।२१।।**
**ऊर्ध्वाकृष्टा भवेत्किञ्चिच्छक्तिर्नाडीमुखं त्यजेत् । ततः स्वतो व्रजत्यूर्ध्वं प्राणोऽतस्तां विचालयेत् ।।२२।।**
**चालनात्सर्वसिद्ध्याप्तिर्-मण्डलाद्योगिनो न तु । रुग्भ्यो भयं यमाच्चापि नेतोऽन्यन्नाडिशोधनम् ।।२३।।**

वज्र+आसने सति पदौ दृढं धृत्वा शिश्न+नाभि+अन्तस्थ+कन्दं प्रपीड्य सिद्धासन+स्थितः..।२०। सं+आकुंचित+नाभिः द्राक् भस्रां कुर्यात्। अतः शक्तिः चलति। धैर्यात् याम+अर्ध+अभ्यासतः मध्यनाड्यां समुद्गता..।२१। शक्तिः किञ्चित् ऊर्ध्व+आकृष्टा भवेत्, नाडी+मुखं त्यजेत्। ततः प्राणः स्वतः ऊर्ध्वं व्रजति। अतः तां विचालयेत्।२२। चालनात् मण्डलात् योगिनः सर्व+सिद्धि+आप्तिः, रुक्+भ्यो भयं न, यमात् अपि च (च)। इतः अन्यत् नाडि+शोधनं न।२३।

(नाकपुड्यांनी) मिळून भस्रिकेचा अभ्यास अर्धा प्रहर (दीड तास) केल्यावर शक्ती (प्राणाला) शीघ्र (पश्चिम) मार्ग देते. म्हणजे कुंडलिनीचा सुषुम्णेत प्रवेश करून देते. ह्या भस्रिकेच्या अभ्यासाने कफादि दोष, रोग आणि पाप यांचा नाश होतो.१९. हठयोगप्रदीपिकेत (२:४४) आठ प्रकारचे कुंभक सांगितलेले आहेत. सूर्यभदेन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्रिका, भ्रामरी, मूर्छा आणि प्लावनी (*सूर्यभेदनमुज्जायी सीत्कारी शीतली तथा। भस्रिका भ्रामरी मूर्छा प्लावनीत्यष्ट कुंभकाः*।।२:४४।।). इथे श्रीस्वामिमहाराजांनी विशेष महत्त्वाच्या भस्रिकेचेच मुख्यतः वर्णन केले आहे.

**शक्तिचालन -** शिश्न आणि नाभी यांच्यामध्ये नऊ अंगुळे (बोटे) लांबीचा अंडाकार कंद असतो. त्याच्यापासून शरीराच्या ७२ हजार नाड्या उगम पावतात. '*ऊर्ध्वं मेंढ्रादधो नाभेः कंदयोनिः खगांडवत्। तत्र नाड्यः समुत्पन्नाः सहस्राणां द्विसप्ततिः।।*' (गोरक्षनाथ). त्यांपैकी मुख्य नाडी सुषुम्णा आहे. तिचे मुख कुंडलिनी शक्तीने अडवलेले असते. तिला विचलित करणे हा कंदताडनाचा उद्देश्य आहे. वज्रासनावर बसून दोन्ही पाय घट्ट धरून दोन्ही टाचांनी त्या कंदाला ताडन करावे.२०. नंतर पुनश्च सिद्धासन घालून गुरूंकडून समजून घेतलेल्या परिधानयुक्तीने बेंबीचे

**चालितायामपि प्राणो बद्ध्वा चेद्रसना सुखम् । व्रजत्यूर्ध्वं सिद्धिपूर्वं राजयोगपदप्रदः ।।२४।।**
**जिह्वां मूलशिरां छित्वा रोममात्रं प्रघर्षयेत् । पथ्यासैन्धवचूर्णैर्गां प्राग्वत्सप्तदिनैर्मुहुः ।।२५।।**
**षण्मासादिति जिह्वाधः शिराबन्धो विनश्यति । मुद्रा स्यात् खेचरी त्र्यध्वे योजिताऽवाङ्मुखी कला ।।२६।।**
**सहृज्जिह्वा चरत्यस्य खे कदापि स्पृशन्ति नो । विषार्तिरुग्जराक्षुत्तृण्निद्रातन्द्रामृतिक्रियाः ।।२७।।**
**स्त्र्याश्लेषितस्यापि बिन्दुर् न क्षरत्यूर्ध्वमेति सः । चलितश्चेद्योनिमुद्रा-बद्धो मुक्तः स भोग्यपि ।।२८।।**

(शक्तेः) चालितायां अपि रसना बद्ध्वा चेत् राजयोगप्रदः प्राणः सुखं सिद्धि+पूर्वं ऊर्ध्वं व्रजति।२४। जिह्वां मूल+शिरां छित्वा गां पथ्या+सैंधव+चूर्णैः रोम+मात्रं प्रघर्षयेत्। मुहु सप्त+दिनैः प्राक्+वत्।२५। इति षण्+मासात् जिह्वा+अधः शिरा+बन्धः विनश्यति।२६। अवाक्+मुखी कला त्रि+अध्वे योजिता खेचरी मुद्रा स्यात्।२६। अस्य जिह्वा सहृत् खे चरति। विष+आर्ति+रुक्+जरा+क्षुत्+तृट्+निद्रा+तंद्रा+मृति+क्रियाः कदा अपि नो स्पृशन्ति।२७। स्त्री+आश्लेषितस्य अपि बिन्दुः न क्षरति, सः ऊर्ध्वं एति। चलितः चेत् योनि+मुद्रा+बद्धः सः भोगी अपि मुक्तः।२८।

आकुंचन करून लगेच भस्रा करावी. याने कुंडलिनी शक्ती विचलित होते. धैर्याने अर्धा प्रहर अभ्यास केल्यावर सुषुम्णेत प्रवेशलेली(२१) शक्ती थोडीशी वर खेचली जाते आणि सुषुम्णेचे मुख सोडून प्राणाला वाट करून देते. मग प्राण आपोआपच वर ब्रह्मरंध्राकडे जाऊ लागतो. याकरिता शक्तीला विचलित करायला पाहिजे.२२. शक्तिचालनाच्या अभ्यासाने एका मंडलात (४० दिवस) योग्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. रोगाचेच काय, पण मृत्यूचेही भय उरत नाही. शक्तिचालनासारखा दुसरा नाडीशुद्धीचा उपाय नाही. शक्तिचालनाला कुंडलिनीचे जागरण असेही म्हणतात.२३.

शक्तीचे चालन झाल्यावर ती सुषुम्णेतून वर चढवायची असते. जिह्वा जर खेचरी मुद्रेने बांधली तर शक्ती अधिक सुखाने ब्रह्मरंध्रकडे जाते. प्राणाची गती सहस्रार चक्राकडे झाली की राजयोग सिद्ध होतो आणि साधकाला अणिमादि सिद्धींची प्राप्ती होते.२४. ही खेचरी मुद्रा सिद्ध करण्यासाठी प्रथम जीभेच्या मुळाशी असलेली शीर कापून ती मोकळी

**सुधान्तःस्रवतीन्दोस्तां ग्रसत्यर्कस्ततो जरा । अधःशीर्षोर्ध्वपात्तिष्ठेद् बह्वाहारः शनैः शनैः ।।२९।।**
**याममात्रं ततः सिद्धिर्व्यस्तेयं करणीष्टदा । वलीपलितवेपघ्नी मृत्युहर्त्री सुधाप्रदा ।।३०।।**

इन्दोः सुधा अन्तः स्रवति। तां अर्कः ग्रसति। ततः जरा। अधः+शीर्षः ऊर्ध्व+पात् तिष्ठेत्। शनैः शनैः बहु+आहारः।२९। ततः याम+मात्रं सिद्धिः। इयं इष्ट+दा वली+पलित+वेप+घ्नी मृत्यु+हर्त्री सुधाप्रदा व्यस्ता करणी।३०।

करायला हवी. हे छेदन अगदी काळजीपूर्वक थोडे थोडे करावे लागते. प्रथम ती शीर निवडुंगाच्या पानासारख्या शस्त्राने अगदी केसभर कापावी आणि हिरडा आणि शेंदीलोण यांचे मिश्रण तिथे चोळावे. यानंतर जीभ शिरेपासून सोडविण्यासाठी आणि लांब करण्यासाठी तिचे चालन आणि दोहन करावे. म्हणजे ती दोन्ही हातांचे अंगठे आणि बोटांनी धरून पुढे-मागे आणि डावी-उजवीकडे ओढून लांबवावी आणि शिरेपासून सुटी करावी. सात दिवसांनी पुन्हा तशीच केसभर कापून पूर्वीप्रमाणेच दोहन-चालनादि करावेत.२५. अशा रीतीने अभ्यास केल्याने सहा महिन्यांत जिभेच्या..

..खालचा शिराबंध पूर्ण सुटतो. तसेच जीभेची लांबी इतकी होते की ती बाहेर काढून तिचा शेंडा भ्रूमध्याला लावता येतो. आता ही जीभ उलटी फिरवून पडजिभेच्या वरच्या छिद्रांतून भ्रूमध्याच्या आतल्या भागाला टेकवली की खेचरी मुद्रा सिद्ध होते.२६. ह्या मुद्रेत साधकाची जिह्वा मनासह आकाशांत जाते (*खे चरति*) म्हणून तिला खेचरी म्हणतात. हिचे फळ असे आहे की त्या योग्याला विषबाधा, रोग, वार्धक्य, तहान, भूक, निद्रा, तंद्रा, मृत्यू कधीही स्पर्श करीत नाहीत.२७. अशा योग्याचे वीर्य स्त्रीच्या आलिंगनानेही स्खलित होत नाही. आणि स्खलन झाले तरीही तो योनी (वज्रोली) मुद्रेच्या अभ्यासाने वर खेचू शकतो. योगशास्त्राच्या सिद्धांतानुसार हे वर ओढलेले शुक्ल वीर्य शिवणीच्या आंतल्या योनिस्थानांतील पोवळ्यासारख्या रक्त वीर्याशी संयुक्त होते आणि त्याचे ओजात रूपांतर होऊन ते सुषुम्णेतून सहस्रार चक्राकडे जाते. असा योगी भोगी असला तरी तो मुक्तच असतो.२८.

**स्वास्येऽग्नौ दीप्तेऽङ्गसादे नाडीशुद्धावनामये । नादस्फुटत्वे सुदृष्ट्याः सिद्धिर्बिन्दौ जिते सति ।।३१।।**
**विविधा उपसर्गाः प्राक् संभवन्त्यत्र योगिनः । सद्गुरोर्दृढभक्त्या ते प्रणश्यन्ति न चान्यथा ।।३२।।**
**कारणं कर्मारुरुक्षोर्योगिनो योगमुत्तमम् । शमः कारणमस्याग्रे योगारूढस्य योगिनः ।।३३।।**
**कामवेगसहोऽन्तर्दृक् सुखारामोऽभितो यतिः । ब्रह्मनिर्वाणमेत्येव ब्रह्मभूतोऽमलः समः ।।३४।।**

सु+आस्ये, अग्नौ दीप्ते, अङ्गसादे, नाडी+शुद्धौ, अनामये, नाद+स्फुटत्वे, सु+दृष्ट्या, बिन्दौ जिते सति सिद्धिः।३१। प्राक् योगिनः विविधा उपसर्गाः संभवन्ति। ते सत्+गुरोः दृढ+भक्त्या प्रणश्यन्ति। अन्यथा च न।३२। उत्तमं योगं आरुरुक्षोः योगिनः कर्म कारणम्। अस्य योग+आरूढस्य योगिनः अग्रे शमः कारणम्।३३। काम+वेग+सहः अन्तः+दृक् अभितः सुख+आरामः ब्रह्मभूतः समः यतिः ब्रह्म+निर्वाणं एति एव।३४।

टाळूच्या आतील चंद्रापासून अमृतस्राव होत असतो. पण बेंबीच्या आतील सूर्य ते खाऊन टाकतो. हेच वार्धक्याचे कारण आहे. या अमृताचेच पान खेचरी मुद्रेने योगी करत असतो. हे अमृत सूर्यापासून राखून पान करण्यासाठी खाली डोके आणि वर पाय अशा स्थितीत राहावे. याने हळूहळू आहार वाढत जातो. म्हणून या मुद्रेचा अभ्यास करताना आहार भरपूर घ्यावा. आरंभी क्षणभर अभ्यास करून तो हळूहळू वाढवीत एक प्रहर (तीन तास) झाला की ही विपरीतकरणी मुद्रा सिद्ध होते. अमृताचा लाभ करून देऊन, अंगावर सुरुकत्या, अकाली केस पांढरे होणे, कंप यांना दूर करून ही मृत्यूला दूर करणारी आहे.२९.

इथे हठयोगाचे निरूपण पूर्ण होते. त्या योगाचे फळ या श्लोकात सांगितले आहे. कांतियुक्त मुख, जठराग्नीचे प्रदीपन, शरीराचे कार्श्य, नाड्यांची शुद्धी, निरोगता, अनाहत नादाचे प्राकट्य, निर्दोष दृष्टी आणि बिंदुजय ही हठयोगाच्या सिद्धीची आठ लक्षणे जाणावीत.३१. पण या सिद्धीच्या मार्गात अनेक विघ्ने आहेत ही सावधानतेची सूचना श्रीस्वामिमहाराज करीत आहेत. पतंजलींनी योगसूत्रांत (१:३०) व्याधि, स्त्यान, आलस्य, अविरति, भ्रान्तिदर्शन,

**कश्चिद्धारणयोपास्ते ध्यानात्कश्चित् समाधिना । आत्मानमेवमाप्त्वेमां सिद्धिं मुक्तो भवत्यसौ ।।३५।।**
**हृद्युपास्यो धारणया वराभयकरो हरिः । प्रादेशमात्रः सुसिद्धः खेचरीमुद्रया युतः ।।३६।।**
**अङ्गुष्ठमात्रं पुरुषं दत्तात्रेयं दिगम्बरम् । ध्यायेत्सिद्धासनासीनं द्युनिशं कण्ठसंस्थितम् ।।३७।।**

कश्चित् धारणया उपास्ते, (कश्चित्) ध्यानात् (उपास्ते), कश्चित् समाधिना (उपास्ते)।३५। प्रादेश+मात्रः वर+अभय+करः सुसिद्धः खेचरी+मुद्रया युतः हरिः हृदि धारणया उपास्यः।३६। अङ्गुष्ठ+मात्रं दिगंबरम् सिद्ध+आसीनं पुरुषं दत्तात्रेयं कण्ठ+संस्थितं द्यु+निशं ध्यायेत्।३७।

अलब्धभूमिकत्व इत्यादि अंतराय सांगितले आहेत. योगशास्त्रातील ग्रंथांत आणि मार्कंडेयादि पुराणांतही त्यांचे सविस्तर वर्णन आहे. श्रीमहाराजांच्या मते ह्या सर्व विघ्नांवर सद्गुरूंची दृढ भक्ती हाच एकमेव उपाय आहे. पतंजलींनीही सर्व गुरूंचाही गुरू जो परमेश्वर, त्याच्या वाचकाच्या - प्रणवाच्या किंवा नामाच्या जपाने अंतरायांचा अभाव होतो (१:२९) असे सांगितले आहे.३२. तेहतिसावा श्लोक भगवद्गीतेतील श्लोकाचा (६:३) अनुवादच आहे. योगाची सिद्धी पावण्यासाठी कर्म हेच साधन आहे. योग सिद्ध झाल्यावर त्या योग्याने कर्माचा त्याग करून - संन्यास घेऊन शमदमादींचा - उपलक्षणाने ज्ञानयोगाचा, अभ्यास करावा. असा थोडक्यात अभिप्राय आहे. श्रीमच्छंकराचार्यांनी या..

..श्लोकाच्या टीकेत स्पष्ट केल्याप्रमाणे, निष्काम कर्मयोग हे ध्यानयोगाचे साधन आहे असे म्हटले आहे. आतापर्यंत पाहिलेला हठयोग हा कर्मयोगातच अंतर्भूत आहे. कर्मयोगाने शुद्ध झालेले चित्त समाधानरूपी योगात स्थिरावते. ते चित्त जसे जसे स्थिर होईल तसा तसा योगी कर्मापासून निवृत्त होत जाईल.३३.

**प्रत्याहार - अन्तर्दृक्** म्हणजे ज्याची दृष्टी आदि इन्द्रिये बाह्य विषयाना सोडून आत वळली आहेत. ज्याची इंद्रिये कासवाच्या अवयवांप्रमाणे विषयांपासून आत ओढली जातात त्याची प्रज्ञा स्थिर होते, असे भगवद्गीतेत प्रत्याहाराचे (२:५८) वर्णन आहे.

**सहस्रदलपद्मस्थं सुसूक्ष्मं शान्तमुज्ज्वलम् । समाधिना द्वादशाहं तन्मयो भावयेत्परम् ।।३८।।**

सहस्र+दल+पद्म+स्थं शांतं उज्ज्वलं सुसूक्ष्मं परं तत्+मयः समाधिना द्वादश+अहं भावयेत्।३८।

त्यामुळेच तो कामाचा वेग सहन करू शकतो. भगवद्गीतेत (५:२३) सांगितल्याप्रमाणे जिवंतपणीच कामक्रोधांचे वेग सहन करणाराच योगी व सुखी होतो. तसेच बुद्धिग्राह्य अतींद्रिय सुखांत (६:२१) तो रमलेला असतो. 'मग जे जे कां निमिख। देखेल माझे सुख। तेतुलेनि अरोचक। विषयीं घेईल।।१२:१०६।।' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे प्रत्याहार आणि आंतरिक सुख आणि हे परस्परसंवर्धक आहेत. या अभ्यासानेच योगी चित्ताचे सर्व मल दूर करून ब्रह्मरूप होऊन ब्रह्मनिर्वाण पावतो. तो सम म्हणजे सुदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जातो. **यतिः** या शब्दाने ही अवस्था दुर्लभ आहे.३४.

कुणी धारणेच्या अभ्यासाने, कुणी ध्यानाने तर कुणा समाधीने आत्म्याची उपासना करतात आणि ही सिद्धी प्राप्त करून मुक्त होतात. आता पुढील एकेका श्लोकाने धारणा, ध्यान आणि समाधी ह्यांचे वर्णन केले आहे.३५.

**धारणा -** पतंजलींच्या मते (३:१) मनाला एका देशात बांधणे म्हणजे धारणा (*देशबन्धश्चित्तस्य धारणा।*). बाहेरच्या किंवा शरीरांतर्गत आलंबनावर चित्त स्थिर करून ठेणे हे धारणेचे लक्षण आहे. गरुडपुराणात धारणेला उपयुक्त असे दहा देश सांगितले आहेत. नाभी, हृदय, छाती, गळा, तोंड, नेत्र, भ्रूमध्य, टाळू आणि त्याच्या थोडा वरचा देश. विष्णुपुराणात भगवंताच्या सगुण मूर्तीवरही धारणा करता येते. '*मूर्तं भगवतो रूपं सर्वोपाश्रयनिःस्पृहम्। एषा वै धारणा ज्ञेया यच्चित्तं तत्र धार्यते।।*' या श्लोकांत श्रीस्वामिमहाराजांनी हृदयाच्या देशात, अनाहत चक्रात, एक वीतभर उंचीच्या वर आणि अभय मुद्रा दाखविणाऱ्या, खेचरी मुद्रेने युक्त अशा पापतापहर दत्तप्रभूंची धारणा करायला सांगितली आहे. ही धारणा अशी केली पाहिजे की संसारांतील कर्तव्ये करतांनाही चित्त तिथून ढळायला नको. धारणेची एक व्याख्या अशी आहे की वृत्ती त्यांत ध्येयाकार होते; पण त्यांत इतर वृत्ती आणि व्यवधान येत राहते. म्हणजेच धारणेतील चित्ताची एकाग्रता ही विच्छिन्न असते.३६.

**अन्तर्लीनसहृत्प्राणो पश्यन्नचलदृग्बहिः । मुद्रेयं शाम्भवी शून्याशून्यलक्ष्मपदप्रदा ।।३९।।**

अचल+दृक् बहिः पश्यन् अन्तः+लीन+सहृत्+प्राणः। इयं शून्य+अशून्य+लक्ष्म+प्रदा शाम्भवी मुद्रा।३९।

**ध्यान -** पुढच्या श्लोकांत ध्यान सांगितले आहे. पतंजलींनी म्हटले आहे, '*तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्।*' ध्यानात ध्येयाकार झालेली वृत्ती अविच्छिन्न आहे. चित्त अखंड तेलाच्या धारेसारखे ध्येयाकडे प्रवाहित होणे, त्यात कसलीही दुसरी वृत्ती न उठणे हे ध्यानाचे लक्षण आहे. इथे श्रीस्वामिमहाराजांनी कंठामध्ये अंगठ्याएवढ्या, सिद्धासनस्थ, दिगंबर पुरुषाचे ध्यान करायला सांगितले आहे. चित्त एक दिवस व एक रात्र (२४ तास) असे स्थिर झाले की ध्यान सिद्ध होते. मागच्या श्लोकांत वीतभर मूर्तीचे ध्यान सांगितले. आता अंगठाभर रूपाचे सांगत आहेत. याचाच अर्थ आलंबन अधिकाधिक सूक्ष्म करायचे आहे.३७.

**समाधी -** ध्यान सिद्ध झाले की समाधीचा अभ्यास करावा. समाधीचा विषय अत्यंत सूक्ष्म, शांत, तेजोमय भगवत्स्वरूप असून स्थान ब्रह्मरंध्रातील सहस्रदलपद्म आहे. ध्यान जेव्हा इतके प्रगाढ होते की योग्याची जाणीव नाहीशी होते. फक्त ध्येयाचेच भान शिल्लक राहते. *तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः।* (योगसूत्र ३:३). समाधीचा काळ बारा दिवसांचा आहे. *अवध्यः सर्वशस्त्राणामशक्यः सर्वदेहिनाम्। अग्राह्यो मंत्रयंत्राणां योगी मुक्तः समाधिना।।* (हठयोगप्रदीपिका ४:११३) समाधी सिद्ध झालेल्या योग्याचा कोणत्याही शस्त्राने वध होत नाही; कुणाही देहधारी जीवाकडून त्याचा पराभव होऊ शकत नाही. मंत्र किंवा यंत्रांचा त्याच्यावर प्रभाव पडत नाही.३८.

**शांभवी मुद्रा -** प्राण आणि मन अंतराकाशांत लीन असतांना निमेषोन्मेषरहित उघडे डोळे मात्र कांहीच न पाहता बाहेर लागलेले आहेत. अशी शून्य आणि अशून्य परमात्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारी शांभवी मुद्रा आहे. **शं** म्हणजे सुख ज्या मुद्रेने होते **भ**वति ती **शांभवी**. **मुत्** अर्थात् निर्विकल्प आनंद - **रा**ति - देणारी, ती **मुद्रा**.

**तद्वान् दृढासनो दक्ष-कर्णे रुद्धबिलो ध्वनिम् । त्रिग्रन्थिभेदं शृणुयात् सुसूक्ष्मं स समाधिभाक् ।।४०।।**
**यमेन दशधा नूनं दशधा नियमेन च । आसनाद्येन षट्केन योगोऽष्टाङ्गोऽयमुच्यते ।।४१।।**

तत्+वान् दृढ+आसनः रुद्ध+बिलः त्रि+ग्रन्थि+भेदं सुसूक्ष्मं ध्वनिं शृणुयात्। सः समाधि+भाक्।४०। दशधा यमेन, दशधा नियमेन च, एन आसनादि षट्केन नूनं अयं अष्ट+अङ्गः योगः उच्यते।४१।

**शून्य** म्हणजे देहादि उपाधिरहित; आणि **अशून्य** म्हणजे निषेधाच्याही अतीत ह्या लक्षणांचे योग्यांनाच गमणारे (*गम्यते अनेन*) **पद** पावविणारी ही मुद्रा आहे. हठयोगप्रदीपिकेत हिचे असे वर्णन आहे, '*अंतर्लक्ष्यं बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता। एषा सा शांभवीमुद्रा वेदशास्त्रेषु गोपिता।।*' (४।३६) भ.पू.पा. शंकराचार्य योगतारावलीत म्हणतात. *नेत्रे ययोन्मेषनिमेषशून्ये वायुर्यया वर्जितरेचपूरः। मनश्च संकल्पविकल्पशून्यं मनोन्मनी सा मयि सन्निधत्ताम*।।१७।।. या श्लोकात या मुद्रेला मनोन्मनी आणि पुढे २१व्या श्लोकात अमनस्क मुद्रा असे तिलाच म्हणले आहे.३९.

**नादानुसंधान -** ही शांभवी मुद्रा लावून दृढ आसनावर बसून, दोन्ही अंगठ्यांनी कान, तर्जनींनी डोळे, मधल्या बोटांनी आणि उरलेल्या बोटांनी तोंड ही बिळे बंद केल्याने, उजव्या कानात नाद ऐकायला येतात. त्यांवर लक्ष केंद्रित केल्याने समाधीचा लाभ होतो. या नादांच्या *आरंभ*, घट, परिचय आणि निष्पत्ती अशा चार अवस्था हठयोगप्रदीपिकेच्या ४थ्या उपदेशात सांगितल्या आहेत. येथे श्रीस्वामिमहाराजांनी त्याचाच निर्देश केला आहे.

**त्रिग्रंथिभेदं -** प्रथम अनाहत चक्रातील रजोगुणात्मक ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हा सुषुम्णेत भूषणांच्या रुणझुणीसारखे नाद ऐकायला येतात. ही आरंभ अवस्था होय. या अवस्थेत कामक्रोधादि राजस भावांचा उपशम होतो. योग्याचे साधन प्रगत झाल्यावर जेव्हा प्राण कंठातील **विष्णुग्रंथी**चा भेद करतो तेव्हा भेरीसारखा आवाज उजव्या कानात ऐकायला येतो. हीच *घटावस्था.* यानंतर प्राण भ्रूमध्यात स्थिरावून तेथील रुद्रग्रंथीचा भेद करतो तेव्हा विशिष्ट वाद्याचा

**एतेनाष्टाङ्गयोगेन प्रबुद्धः स्वल्पसंविदा । शुभाशुभविनिर्मुक्तो देही ब्रह्ममयो भवेत् ।।४२।।**

एतेन स्वल्प+संविदा अष्ट+अङ्ग+योगेन प्रबुद्धः शुभ+अशुभ+विनर्मुक्तः देही ब्रह्म+मयः भवेत्।४२।

ध्वनी ऐकायला येतो. मग चित्तवृत्तीरूप आनंद मावळून स्वाभाविक आत्मानंद प्रकट होतो. ही तिसरी *परिचयावस्था.* तो या अवस्थेत योगी भूक, तहान, झोप, त्रिदोषजन्य दुःखे यांपासून मुक्त होतो. चौथ्या *निष्पत्ती* अवस्थेत प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिर होतो आणि बासरीच्या आवाजासारखा नाद उजव्या कानात ऐकायला येतो. हीच निष्पत्ती अवस्था. ह्यालाच राजयोग असे म्हणतात. या अवस्थेला पोचलेल्या योग्याला जगाची उत्पत्ती आणि लय करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. भ.पू.पा. शंकराचार्यांनी नादानुसंधानाने होणाऱ्या चित्ताच्या लयाला सर्वश्रेष्ठ लय मानले आहे. (*सदाशिवोक्तानि सपादलक्षलयावधानानि वसन्ति लोके। नादानुसंधानसमाधिमेकं मन्यामहे मान्यतमं लयानाम्।* योगतारावली ४)४०.

**अष्टांगयोग -** आतांपर्यंतच्या विवेचनांत श्रीमहाराजांनी आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही सहाच अंगे (**षट्क**) सांगितली आहेत. आता आणखी दोन अंगांचा विचार करून अष्टांगयोग संपूर्ण केला आहे. दहा प्रकारचा यम आणि दहा प्रकारचे नियम ही ती दोन अंगे. योगशास्त्रानुसार ते पुढीलप्रमाणे आहेत.

*अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः। दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश।*
*तपः संतोष आस्तिक्यं दानमीश्वरपूजनम्। सिद्धांतवाक्यश्रवणम् ह्रीमती च तपो हुतम्।*
*नियमा दश संप्रोक्ता योगशास्त्रविशारदैः।।*

पातंजल योगसूत्रात यम आणि नियम प्रत्येकी पाचच सांगितले आहेत. शांडिल्यादि इतर योगशास्त्रकारांनी आणि पुराणातही त्यांची संख्या वरीलप्रमाणे दहा दहा सांगितली आहे. यम हे दोषांपासून दूर राहण्यासाठी आहेत तर नियम हे गुणरूप आहेत. हे सामान्य मानव धर्माचे अंगभूत असल्याने कुणी कुणी यांना योगाची अंगे न मानता योगाला षडंगच म्हणतात.

**इदं रहस्यं परमं नाख्येयं यस्य कस्यचित् ।।४३।।**

**।। इति योगाख्यं प्रथमं रहस्यम् ।।**

इदं परमं रहस्यम्। यस्य कस्यचित् न आख्येयम्।४३।

अर्थात् हे यमनियम योगाभ्यासाचा पायाच आहेत. योगाच्या सिद्धीनंतरही लोकसंग्रहासाठी यांचे अनुष्ठान आवश्यकच ठरते.४१. या स्वल्प म्हणजे सूक्ष्मस्वरूप परमेश्वराचे ज्ञान करून देणाऱ्या अष्टांगयोगाने ऐतरेय उपनिषदांत (१:३:१३) सांगितल्याप्रमाणे 'तोच हा पुरुष, ब्रह्म जीवमात्रांत व्याप्त आहे.' अशा ज्ञानाने प्रबुद्ध झालेला जीव शुभ आणि शुभ यांच्यापासून मुक्त होऊन ब्रह्मरूप होतो.४२.

**रहस्य -** ह्या अर्ध्या श्लोकात ग्रंथकारांनी हे रहस्य आहे आणि अनधिकारी माणसाला सांगू नये. असा आदेश दिला आहे. भगवद्गीतेतही (१८:६४) 'अर्जुना हे सर्व गुह्यांत गुह्यतम मी तुला सांगतो आहे.' असे स्पष्ट करून ते 'कधीही तपरहित, भक्तिहीन, सेवापराङ्मुख आणि परमेश्वराविषयी दोषदृष्टी ठेवणाऱ्याला सांगू नये' (६७) असा दंडक घातला आहे. हे सर्वच आध्यात्मिक ग्रंथांना लागू आहेच. इथे आणखी एक सूचना पुनरुक्तीचा दोष घेऊन करावीशी वाटते की हा ग्रंथ जिज्ञासूंना योगाची अंशतः तरी माहिती व्हावी या लोककल्याणाच्या भावनेने केला आहे. ह्यांत योगाची अनेक रहस्ये गुप्तच ठेवण्यात आलेली आहेत.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील योगरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**

## ।। अथ बोधरहस्यम् ।।

**सन्तप्त धन्य संन्यासिन् गुरुभक्त गतागतात् । मुक्त्या आत्माप्तये तत्त्व-जडचैतन्यविद्भव ।।१।।**

संतप्त धन्य संन्यासिन् गुरु+भक्त गत+आगतात् आत्म+आप्तये मुक्त्यै तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव।१।

श्रीगणेशाय नमः। कठोपनिषदांत (२:१:१) इंद्रिये बहिर्गामी असल्याने ती अंतरात्म्याला पाहू शकत नाहीत; त्यासाठी त्यांना आत वळवून मोक्षाच्या इच्छेने प्रत्यगात्म्याला एकादाच धीर पुरुष पाहतो (*कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्*). याचे दिग्दर्शन योगरहस्यात करून आता तिथेच (१:२:९) पुढे सांगितलेल्या 'ते दुसऱ्याकडूनच जाणून चांगले समजते' (*प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ*) या श्रुतिवाक्याचा भावार्थ व्यक्त करण्यासाठी हे बोधरहस्य केले आहे. योगरहस्यात सांगितल्याप्रमाणे योगाने मन-पवनांना स्थिर केल्यावर करावयाचा चित्ताच्या उपशमाचा, म्हणजेच आत्मज्ञानाचा अभ्यास बोधरहस्यात सांगितला आहे. बोध म्हणजेच ज्ञान आणि ज्ञानानेच मोक्ष म्हणजे निरतिशय आनंद - ज्यात सर्व दुःखांचा आत्यंतिक निरास अंतर्भूत आहे. हा सूत्रात्मक ग्रंथ श्रीस्वामिमहाराजांनी गुरु-शिष्यसंवादाच्या रूपात मांडलेला आहे. संवादात गुरुमहाराजच सांगत आहेत. शिष्याचे प्रश्न अपेक्षित किंवा अध्याहृत आहेत.

कुणी एक सुसंस्कृत ब्राह्मण वेदाध्ययन करून, गृहस्थाश्रमात विहित कर्मांचे आचरण करून आपल्या चित्तातील मलांचा निरास करून, परमेश्वराची उपासनाही करून दैवयोगाने त्रिविध तापांनी **संतप्त** होऊन वैराग्याने श्रीगुरूंना शरण आला. त्याची ती अवस्था पाहून कृपाळू भगवान् श्रीगुरू त्याला विचारीत आहेत.

**अधिकार -** पहिल्या श्लोकात शिष्याला उद्देशून चार संबोधने आहेत. त्या संबोधनांतून हा बोध घेण्याला शिष्य कसा योग्य आहे ते स्पष्ट होते. पहिले संबोधन आहे, '**संतप्त**'! म्हणजेच संसारांतल्या आध्यात्मिक, आधिभौतिक

आणि आधिदैविक अशा तीन प्रकारच्या तापांनी होरपळलेला! (आध्यात्मिक म्हणजे स्थूल शरीरातच निर्माण होणारी व्याध्यादि पीडा, व सूक्ष्म शरीरात होणारी दंभ-मद-मानादि आंतरपीडा, आधिभौतिक म्हणजे स्वशरीराहून भिन्न असणाऱ्या, प्रत्यक्ष परिदृश्यमानच चराचर जगापासून होणारी पीडा व आधिदैविक म्हणजे चर्मचक्षूला अदृश्य असणाऱ्या भूतप्रेतपिशाच प्रभृति शक्तींपासून होणारी पीडा.) अर्थातच ह्या संसाराच्या दुःखमयतेची खात्री पटलेला आणि त्यामुळे संसाराला उबगलेला. संसारातील सुखे कशी फसवी, क्षणभंगुर आणि दुःखपर्यवसायी आहेत हे मनांत बिंबल्याने ऐहिक किंवा पारलौकिक अशा सर्व सुखांच्या भोगांचा तिटकारा म्हणजेच वैराग्य (*इहामुत्रफलभोगविरागः*) उपजलेला. या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात सांगितलेला '*भवभ्रष्टमना*'. हा संसाराचा उबग किंवा वैराग्य हे कांही पूर्वपुण्याईवाचून येत नाही. याचा सविस्तर विचार योगवासिष्ठांत वैराग्य प्रकरणात पाहावा. अर्थातच ह्या वैराग्यावरून त्याची **धन्य**ता सिद्ध होते. हे वैराग्य हे ज्ञानाच्या चार साधनांचे उपलक्षण जाणावे. (साधनचतुष्टय - १. वैराग्य, २. विवेक, ३. शम-दम-श्रद्धा-तितिक्षा-उपरती-समाधान ही षट्संपत्ती आणि ४. तीव्र मुमुक्षा) गुरुमहाराज त्याला (हे) **संन्यासिन्** असे म्हणत आहेत. याचा अर्थ हा बोध घेणारा शिष्य संन्यासी असला पाहिजे. मग तो '*काम्यानां कर्मणां न्यासम्*' असा विद्वत्संन्यास असो की विविदिषा प्राप्तीनंतर घेतलेला विधिपूर्वक संन्यास असो.

पुढचे संबोधन **गुरुभक्त** असे आहे. सर्व जीवमात्रांत गुढरूपाने अवस्थित असणाऱ्या, मात्र गंभीर, अनिर्वचनीय आणि दुस्तर मायेच्या प्रभावाने अनुभवाला न येणाऱ्या परमाणूपेक्षाही सूक्ष्म आत्म्याचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर आपल्या बुद्धीनेच तर्क करून ते होणार नाही. ते दुसऱ्या ज्ञानी पुरुषांकडूनच मिळवावे लागते (कठ उ.२:९). श्रीमद्भागवतांत (११:३:२२) '*शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्*' अर्थात् ज्याला आत्म्याचे शाब्द - परोक्ष ज्ञानही आहे, जो साक्षात्कारी आहे आणि जो आत्मानंदातच रमलेला आहे अशा गुरूंकडूनच आत्मज्ञान प्राप्त होते. अशाच आत्मज्ञानी पुरुषांना संत म्हणतात. श्रीमदादिशंकराचार्य त्यांच्याविषयीच म्हणतात, '*शान्ता महान्ताः निवसन्ति संताः*

**स्वान्याज्ञं जडमन्या चिन्नामरूपात्मकं जडम् । रोमत्वङ्मांसनाड्यस्थि भुवोऽद्भ्यो मूत्ररेतसी ।।२।।**

स्वान्याज्ञं जडं (ज्ञेयम्) अन्या चित् (ज्ञेया) नामरूपात्मकं जडम्। रोमत्वङ्मांसास्थि भुवः (भवन्ति) मूत्ररेतसी स्वेदः अस्र+लाले च अद्भ्यः (भवन्ति)।२।

*वसंतवल्लोकहितं चरन्तः।*' परमार्थात सद्गुरूंच्या अनिवार्यतेची ग्वाही देणाऱ्या श्रुती, स्मृती, पुराणवचने आणि संतवचने किती तरी आहेत. अशा सद्गुरूंना शरण जाऊन त्यांचा आदर करून, त्यांची सेवा करून, त्यांना जिज्ञासू भावाने प्रश्न केल्यावर ते ज्ञानाचा उपदेश करतात असे भ.गीतेचेही वचन आहे (*तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः*।।४.३४।।). केवळ गुरूंकडे जाऊन काम होत नाही तर त्यांना शरण जाऊन त्यांची भक्ती केली पाहिजे असा अभिप्राय आहे. श्वेताश्वतर उपनिषदानुसार ज्याची देवावर भक्ती आहे, आणि देवासारखीच गुरूवरही भक्ती आहे त्या महात्म्याच्याच चित्तात हे सांगितलेले अर्थ प्रकाशतील (*यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्येते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः*।।६.२३।।). भगवद्गीतेतही हे ज्ञान अभक्ताला सांगू नये असे म्हटले आहे.

**प्रयोजन -** अशा रीतीने ह्या चार संबोधनांतून त्या शिष्याने आत्मज्ञानप्राप्तीचा अधिकार संपादन केला आहे असे सूचित केल्यावर ग्रंथाचे प्रयोजन '**आत्म+आप्तये मुक्त्यै**' या शब्दांत सांगितले आहे. आत्म्याची प्राप्ती करून घेऊन जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे. शेवटी '**तत्त्व+जड+चैतन्य+वित् भव**' या पदातून ह्य ग्रंथाचा विषय स्पष्ट केला आहे. इथे तत्त्वे म्हणजे सांख्ययोगातील प्रतिपादित तत्त्वे. यांची संख्या २५ असून पुढच्या साडेतीन श्लोकांत ती सांगितली आहेत. ह्या तत्त्वांचा अंतर्भाव जडातच होतो हे पुढे स्पष्ट करतील. ही तत्त्वे आणि जड काय आणि चैतन्य काय हे जाणणाराच आत्मज्ञान प्राप्त करून मुक्त होतो.१.

**स्वेदोऽस्रलालेऽग्रेः क्षुत्तृण्-निद्रा तन्द्रा रतिर्गतिः । लौल्यं निरोधः प्रसाराकुञ्चने मरुतोऽथ खात् ।।३।।**

(स्वेदः, अस्त्र+लाले (भवंति)) अग्नेः (सकाशात्) क्षुत्-तृट्-निद्रा-तंद्रा-रतिः (भवंति) मरुतः (सकाशात्) गतिः+लौल्यं+निरोधः प्रसार+आकुंचने (भवंति)। अथ खात्।३।

**जड -** प्रथम जडाची व्याख्या केली आहे. स्वतःला किंवा इतरांना जे जाणत नाही (**स्व+अन्य+अज्ञं**) ते जड. म्हणजे जाणीवरहित घटपटादि वस्तू म्हणजे जड. यापेक्षा वेगळे जाणीव असणारे ते चेतन (conscious) (**अन्या चित्**). जड हे दृश्य आहे तर चेतन ही दृक् (दृष्टी) आहे. तू, मी, असा प्रत्यय ज्याला येतो तो चेतन पदार्थ आहे. जड हे विषय आहेत तर चेतन विषयी आहे. जगात हेच दोन पदार्थ आहेत. चेतन पदार्थ मुख्य आहे व जड पदार्थ गौण आहेत. चेतन पदार्थ स्वतःसाठी (स्वार्थ) आहे व जड पदार्थ दुसऱ्यासाठी (परार्थ). असे हे जड आणि चेतन पदार्थ प्रकाश आणि अंधाराप्रमाणे परस्परविरुद्ध आहेत. जड वस्तू ह्या चेतनासाठी आहेत. जड हे नामरूपात्मक आहे हा दुसरा सिद्धांत आहे. याचाच अर्थ चेतन हे नामरूपातीत आहे.

आता आपल्याला चेतन वाटत असलेला हा देह हा कसा जड किंवा अचेतन आहे ते सांगत आहेत. त्यासाठी तो कसा पंचमहाभूतांचा बनलेला आहे त्याचे वर्णन केले आहे. प्रथम स्थूल देहाचे किंवा अन्नमय कोशाचे वर्णन आहे.

**पृथ्वी** या भूतापासून रोम, त्वचा, मांस, नाड्या आणि अस्थी झाल्या आहेत. हे पाच पदार्थ पृथ्वीसारखे कठीण आहेत. **जला**पासून मूत्र, वीर्य, घाम, रक्त आणि लाळ हे पाच पातळ, प्रवाही पदार्थ झालेले आहेत.२. **अग्नी**पासून क्षुधा, तृषा, निद्रा, तंद्रा (आळस) आणि रती म्हणजे मैथुन किंवा कांती. **वायू**पासून गती (हालचाल), निरोध, चांचल्य, प्रसरण, आकुंचन हे पाच होतात. **आकाशा**पासून(३) काम, क्रोध, लोभ, लोभ आणि भीती हे पाच.

**कामक्रुड्लोभमोहाभीस्-तदाढ्येयं जडा तनुः । वर्णाश्रमादिद्वन्द्वादि-संबन्धादिपरो भवान् ।।४।।**
**यन्निर्विकल्पं स्फुरति तदन्तःकरणं मनः । तत्सङ्कल्पविकल्पाभ्यां तत्तु धीर्निश्चयात्मकम् ।।५।।**

काम-क्रुड्-लोभ-मोहा+भीः (भवंति) तत्+आढ्या इयं जडा तनुः (अस्ति) भवान् वर्ण+आश्रमादि द्वंद्वादि संबन्धादि परः (अस्ति)।४।
- यन्निर्विकल्पं स्फुरति तत् अन्तःकरणम्। यत् संकल्प+विकल्पाभ्यां (उपलक्षितं) तन्मनः। यत्+निश्चय+आत्मकं तत्+चित्तम्।५।

अशा ह्या पाच भूतांच्या अंशापासून झालेल्या पंचवीस तत्त्वांचा हा जड किंवा स्थूल देह बनलेला आहे. वर्ण, आश्रम इत्यादि, तसेच सुख-दुःखादि द्वंद्वे, पिता, पुत्र इत्यादि संबंध हे या स्थूलदेहालाच आहेत. तू (या बोधरहस्यांत शिष्याला 'आपण' हे बहुमानार्थी संबोधनच वापरले आहे) यांच्या पलीकडे आहेस.४. तहान-भूक आदि प्राणाचे धर्म आणि काम-क्रोधादि मनाचे धर्म वर स्थूलदेहाच्या निरूपणांत आले आहे त्याचा अर्थ त्यांचे स्थूल देहावर होणारे परिणाम असा घ्यावा.

**सूक्ष्म देह -** 'मग ही सुख-दुखांची अनुभूती कुठून येते' याचे उत्तर साक्षी असा जो प्रत्यगात्मा त्याचे अंतःकरणाशी तसेच त्या अंतःकरणाचे स्थूल देहाशी झालेले तादात्म्य हेच आहे. त्या परस्परदेहांच्या तादात्म्यानेच सुख-दुःखांचे आभास होतात हे स्पष्ट करण्यासाठी प्रथम ते अंतःकरण वृत्तींसह सांगितले आहे. तूष्णी किंवा तटस्थ (आपण ज्याला सुन्न किंवा बधीर म्हणतो त्या) अवस्थेत किंवा समाधी अवस्थेत जे वृत्तीरहित स्फुरण होते ते **अंतःकरण** जाणावे. वृत्ती म्हणजे पाण्यावर जशा लाटा उद्भवतात तसे मनावर उठणारे तरंग. योगसूत्रात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, व स्मृती अशा पाच वृत्तींचे वर्णन आहे. त्याशिवाय सुख, दुःख, इच्छा, द्वेष इत्यादि वृत्तीही आहेत. अंतःकरण जेव्हा जाग्रत, स्वप्न या अवस्थात संकल्प आणि विकल्प वृत्तींनी व्यापले जाते तेव्हा त्याला **मन** ही संज्ञा प्राप्त होते. संकल्प म्हणजे एखादी गोष्ट चांगली वाटणे. ह्याच्यापासूनच काम म्हणजे इच्छा उद्भवते. विकल्प म्हणजे आधीच्या कल्पनेपेक्षा वेगळी कल्पना. तेच अंतःकरण एखाद्या गोष्टीचा निश्चय करते तेव्हा त्याला **बुद्धी** असे म्हणतात. उदाहरणार्थ 'गूळ गोड आहे', हा संकल्प आहे. तो आपल्याला अनिष्ट आहे हा विकल्प. हे मनाचे धर्म आहेत. विचारांती तो खाऊ नये असा निश्चय हा बुद्धीने केला जातो.५.

**अनुसन्धानकं चित्तमहङ्कारस्त्वहङ्कृतिः । व्यानाधार्याद्यं श्रुतेस्तु शब्दभुग्वक्ति वाक्सखम् ।।६।।**
**समानाधारि त्वचान्यत् स्पर्शाशियादातृ दातृ च । उदानाधारा धीर्नेत्राद् रूपभुक्सगमागमा ।।७।।**
**जिह्वया प्राणवच्चित्तं रसभुग्रतिमूत्रकृत् । सापानाहङ्कृतिर्घ्राणाद् गन्धभुग्विड्विसर्गकृत् ।।८।।**

अनुसंधानकं चित्तम्। यत्+अहंकृतिः तत्+अहंकारः (उच्यते)। आद्यं तु व्यान+आधारि श्रुतेः शब्द+भुक् वाक्+सखं वक्ति।६।
अन्यत् समान+आधारि त्वचा स्पर्श+आशि आदातृ दातृ च उदान+आधारा धीः नेत्रात् रूप+भुक् स+गम+आगमा (भवति)।७।
प्राणवत्+चित्तं जिह्वया रस+भुक् रति+मूत्र+कृत् (भवति) स+अपान+अहंकृतिः घ्राणात् गंध+भुक् विड्+विसर्ग+कृत (भवति)।८।

अनु म्हणजे नंतर संधान ठेवणारे. अर्थात अनुभवानंतर त्याचे स्मरण करणाऱ्या अंतःकरणाला **चित्त** असे म्हणतात. तेच अंतःकरण जेव्हा 'मी' या वृत्तीने स्फुरते तेव्हा त्याला **अहंकार** म्हणतात. एकच अंतःकरण त्याच्या वृत्तींवरून पाच प्रकारे ओळखले जाते. म्हणून या पाचांना अंतःकरणपंचक असेही म्हटले जाते. हे पाच पृथ्व्यादि भूतांच्या सत्त्वगुणापासून झालेले आहेत. त्याच भूतांच्या सत्त्वगुणापासून ज्ञानेंद्रिये, रजोगुणापासून प्राण आणि कर्मेंद्रिये ही जड असूनही तू जो चेतन त्याच्या सान्निध्याने चेतनाप्रमाणेच भासतात आणि व्यवहारही करतात.

पहिले जे **अंतःकरण** ते **व्यान** वायूच्या आश्रयाने श्रोत्रेंद्रियांद्वारा (कानांनी) विविध वर्ण आणि विविध स्वर यांनी युक्त अशा **शब्द** या विषयाचा उपभोग घेते आणि **वाक्**इंद्रियाच्या द्वारां (वाचेने) शब्दांची उत्पत्तीही करते.६.

दुसरे जे **मन** ते **समान** वायूच्या आश्रयाने **त्वचा** (कातडी) **स्पर्श** या विषयाचा भोग घेते, आणि हातांच्या (**हस्त**) माध्यामातून देणे-घेणे या क्रिया करते.

तिसरी **बुद्धी** ही **उदान** वायूच्या आधारे **नेत्र** इंद्रियांनी (डोळ्यांनी) रूप हा विषय भोगते आणि **पाद** म्हणजे पायांनी जाण्यायेण्याच्या क्रिया करते.७.

**कर्मज्ञानेन्द्रियैः पुण्य-पापयोः सुखदुःखयोः। भौतिके पञ्चके कर्तृ-भोक्तृत्वे द्वन्द्वतापि च ।।९।।**
**तल्लिङ्गदेहतादात्म्यात् कर्तृत्वादि वृथार्जितम् । हेतुदेहपरस्वात्म-ज्ञानान्मुक्तिर्ध्रुवाऽचिरात् ।।१०।।**

भौतिके पंचके कर्म+ज्ञान+इंद्रियैः पुण्य+पापयोः सुख+दुःखयोः कर्तृ(त्व)+भोकृत्वे (भवतः) च द्वंद्वतापि (भवति)।९। तत् लिंग+देह+तादात्म्यात् (त्वया) कर्तृत्वादि वृथा अर्जितम्। हेतु+देह+पर+स्व+आत्म+ज्ञानात् अचिरात् मुक्तिः ध्रुवा (अस्ति)।१०।

चौथे **चित्त प्राण** वायूशी जुडून **जिह्वा** (रसना) या इंद्रियांने **रस** या विषयाचा आस्वाद घेते आणि **उपस्थ** (लिंग) या कर्मेंद्रियाने **रति** (मैथुन) आणि **मूत्रोत्सर्ग** या क्रिया करते.

शेवटचा **अहंकार अपान** वायूशी मिळून **घ्राण** (नाक) इंद्रियाने **गंध** (वास) या विषयाचा भोग करते आणि **गुद** इंद्रियांने **मलविसर्ग** करते. ८.

अशा रीतीने पंचधा अंतःकरण आणि पाच प्राण यांच्याद्वारा कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये पुण्य आणि पाप करतात; तेच पाच त्यांची फळे - सुख आणि दुःख, भोगतात; कर्मेंद्रियांकडे कर्तृत्व आणि ज्ञानेंद्रियांकडे भोक्तृत्व आहे. भूक-तहान, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वेही त्याच सूक्ष्मभूतांपासून झालेल्या पंचकाची - म्हणजेच लिंगदेहाची (सूक्ष्मदेहाची) आहेत. अन्नमय स्थूलदेहाशी त्यांचा संबंध नाही. कारण जेव्हां हा लिंगदेह मृत्यूच्या वेळी स्थूल देहापासून वेगळा होतो तेव्हा त्या अचेतन देहात कर्तृत्व-भोक्तृत्वादि राहत नाहीत.९. शीतोष्णादि द्वंद्वे तसेच कर्तृत्व-भोक्तृत्व हे जर लिंगदेहांशीं निगडित आहेत तर मग त्यांच्याशी तुझा कांहीच संबंध नाही हे स्पष्टच आहे. लिंगदेहाशी तादात्म्य झाल्याने, आपण लिंगदेह आहो या अध्यासाने तू उगीचच हे कर्तत्व-भोक्तृत्व स्वतःवर लादलेले आहे. 'तर मग ते कसे नष्ट करता येईल?' असे विचारशील तर ऐक. लिंगदेहाला तुझ्याशी जोडणारा जे कारणदेह (**हेतुदेह**) आहे त्याच्या पलीकडचे जे तुझे आत्मस्वरूप आहे त्याचे ज्ञान होताच तत्क्षणी तुझ्या कर्तृत्व-भोक्तृत्वांचा लोप होऊन तू कायमचा मुक्त होशील.१०.

**स्वदिदृक्षवरराज्ञान-हेतुसाक्षी परो भवान् । निराकारस्वात्मबुद्धि-महाकारणसाक्ष्यपि ।।११।।**
**स्थाणुरन्तर्बहिर्भास्वानात्मारामो निराकृतिः । चतुर्देहपरः साक्षी प्रत्यगीशोऽसि विद्ध्यदः ।।१२।।**

भवान् स्व+दिदृक्षुः+अरर+अज्ञान+हेतु+साक्षी परः असि। निराकार+स्व+आत्म-बुद्धि+महाकारण+साक्षी+अपि (असि)।११। स्थाणुः अन्तः+बहिः+भास्वान् प्रत्यक्+ईशः असि। अदः (मयोक्तं) विद्धि (येन) निः+आकृतिः निः+अभिमानः चतुः+देह+पर आत्म+आरामः च भविष्यसि।१२।

**कारणदेह -** आपल्या स्वरूपाला पाहू इच्छिणाऱ्याला दारासारखे अडवणारे अज्ञान आहे. हेच वर सांगितलेल्या स्थूल आणि लिंगदेहाचे बीज आहे. तेच सर्व ज्ञानाचा उपसंहार करून बुद्धीला आपल्या बीजात किंवा कारणात विलीन करते. हे रोजच झोपेच्या अवस्थेत आपण अनुभवतो. हाच कारणदेह. 'मग हाच आत्मा का म्हणू नये?' तर हा कारणदेह तमोगुणाने व्यापलेला आहे. झोपेतून उठल्यावर 'मी गाढ झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही' असे म्हणणारा तू त्या अज्ञानाला जाणणारा आहेस. तू त्याच्या पलीकडचा, स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा आणि त्यांचे अभिमानी, विश्व, तैजस् आणि प्राज्ञ यांचा साक्षी आहेस. साक्षात् पहाणारा म्हणजे **साक्षी**. असा तू आहेस. 'मी निराकार आत्मस्वरूप आहे' ही जाणीव म्हणजेच **महाकारणदेह**. इथेही सूक्ष्मरूपाने 'मी' ही जाणीव उरलेली असते. त्याच्याही पलीकडे तू आहेस. 'मग मी काय अभावरूपी (जड) आहे?' असे विचारशील तर तसे नाही. कारण त्या अंतिम वृत्तीचाही तू साक्षी आहेस. स्वयंप्रकाश आहेस.११.

**अन्नासुहृद्ध्यहङ्कार-मयतादात्म्यतो भ्रमः । स्थूलः पञ्चीकृतैर्भूतैः सूक्ष्मः कर्मेन्द्रियासुभिः ।।१३।।**
**धीन्द्रियैर्हेतुर्महांश्च तद्विदात्मन्यथोद्धृते । अन्वयव्यतिरेकाभ्यां परं ब्रह्मैव शिष्यते ।।१४।।**

अन्न+अस+हृद्+धी+अहंकार+मय+तादात्म्यतो भ्रमः (भवति)। पंचीकृतैः भूतैः स्थूलः, कर्म+इन्द्रिय+असुभिः सूक्ष्मः, धी+इन्द्रियैः हेतुः, महान् च (अस्ति) अथ तद्विदा अन्वय+व्यतिरेकाभ्यां आत्मनि उद्धृते परं ब्रह्म+एव शिष्यते।१३-१४।

एखाद्या स्तंभासारखा तू निष्क्रिय, निर्विकार आहेस. यालाच कूटस्थ (कूट = ऐरण) असेही म्हणतात. सोनाराच्या ऐरणीसारखा स्थिर, निष्क्रिय राहून त्यावर घडणाऱ्या अलंकाराशी कसलाही संबंध नसणारा. मात्र कूट जसा परिच्छिन्न - देश, काल, वस्तू आदींनी संकुचित असतो तसा तू नाहीस. तू आत आणि बाहेर प्रकाशमान आहेस. ज्ञानस्वरूप आहेस. हे तुझे मी केलेले वर्णन समजून घे, म्हणजे तू निराकार, निरभिमान, चारी देहांच्या पलीकडील आत्माराम होशील.१२.

**पंचकोश -** तुला असे वाटेल की मी सांगत असलेले जाणणे तुझ्या अनादिकालापासूनच्या भ्रमाने प्रभावित बुद्धीला कसे शक्य होईल? तर ऐक, स्फटिकाजवळ जर जास्वंदीचे फूल ठेवले तर तो स्फटिक लाल रंगाने रंगलेला दिसतो. तसेच कांहीसे तुझे या पंचकोशात्मक देहाच्या तादात्म्याने झालेले आहे. जास्वंदीचे ते फूल स्फटिकापासून बाजूला केले की त्याचे शुद्ध शुभ्र धवल स्वरूप स्पष्ट होते तसेच या पाच कोशांपासून धैर्याने आणि विवेकाने कठोपनिषदांतल्या वचनाप्रमाणे मुंज तृणांतून काडी काढावी तसे आत्मस्वरूप पृथक् केल्याने ('*अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा..*' २:६:१७) तुला ते जाणता येईल. यासाठी तुला आता पाच कोशांचा परिचय करून देतो. **अन्न**मय, प्राणमय (**असु**), मनोमय (**हृत्**), विज्ञानमय (**धी** = बुद्धी) आणि आनंदमय (**अहंकार**) हे ते पाच कोश आहेत. यांच्याशी तादात्म्य पावल्यानेच आपण आपल्याला जन्मादि विकारशील, तहान-भूक वगैरे द्वंद्वांनी प्रभावित, संकल्प-विकल्प करणारा, विज्ञानवान् कर्ता आणि आनंदवान् भोक्ता समजतो.

**भानं स्वप्नेऽस्योर्वभानेऽन्वयः प्राग्विस्मृतिः परः । लिङ्गाभानेऽन्वयः स्वाप-भानं प्राग्विस्मृतिः परः ।।१५।।**

स्वप्ने उरु+अभाने अस्य भानं अन्वयः, प्राक् विस्मृतिः परः(व्यतिरेकः)। लिङ्ग+अभाने स्वाप+भानं अन्वयः प्राक् विस्मृतिः परः।१५।

आता हे पाच कोश थोड्या विस्ताराने पाहू. पंचीकृत भूतांपासून झालेला हा स्थूलदेहच **अन्नमय कोश** आहे.१३.

रजोगुणापासून झालेल्या कर्मेंद्रिये आणि पांच प्राण यांचा मिळून सूक्ष्मदेहांतर्गत **प्राणमय** कोश होतो. सत्त्वगुणात्मक ज्ञानेंद्रिये आणि मन यांचा **मनोमय** कोश तसेच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धी यांचा **विज्ञानमय** कोश होतो. इथे श्लोकात मनोमयाचा अंतर्भाव विज्ञानमयात केला आहे. पाचवा **महान्** नावाचा **आनंदमय** कोश आहे. ह्या कोशांना जाणून, अन्वय आणि व्यतिरेक यांनी त्यांच्यापासून आत्मा बुद्धीने निवडून काढला की परब्रह्मच उरते.१४.

अन्वय म्हणजे अनुवृत्ती आणि व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ती. म्हणजे स्वप्नात असताना स्थूल देहाचे भान नसते. तरी हा अपरोक्ष आत्मा स्वप्न पहाणारा साक्षी असतोच. अर्थात् स्वप्नावस्थेत आत्म्याचा अन्वय (अनुवृत्ती) आहे. त्या वेळी आधीच्या स्थूलदेहाची विस्मृती होते. म्हणजेच स्वप्नावस्थेत स्थूलदेहाची व्यतिरेक (व्यावृत्ती) आहे. त्याचप्रमाणे जागेपणी सूक्ष्मदेहाची विस्मृती किंवा व्यतिरेक असतो. पण साक्षी आत्मा इथेही असतोच. म्हणजे त्याचा अन्वय आहेत. गाढ झोपेच्या अवस्थेत स्थूल देह आणि लिंगदेह या दोहींचे पूर्ण विस्मरण होते. अर्थात् त्यांचा व्यतिरेक आहे. त्या वेळी कसलेच ज्ञान नसले तरी झोपेतून उठल्यावर 'मी सुखाने झोपलो होतो, मला कांहीसुद्धा कळाले नाही,' असे त्याला आठवते. याचा अर्थ त्या अज्ञान आणि आनंदमय अवस्थेचा अनुभव घेणारा तिथे होताच. त्याशिवाय त्याला ते कसे आठवले असते? म्हणजे या अवस्थेतही आत्मा साक्षित्वाने आहे.१५.

**तद्विदोऽसुमनोध्याख्या गुणावस्थाभिदः पृथक् । सुप्त्यभानेऽन्वयो भानं समाधौ प्राग्वदन्यकः ।।१६।।**
**त्यक्तत्रिदेहसङ्गस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् । स्थितिः परात्परं वस्तु सच्चिच्छर्म निराकृति ।।१७।।**

समाधौ सुप्ति+अभाने (अस्य) भानं अन्वयः अन्यकः प्राग्वत्। गुण+अवस्थाभिदः असु-मनो-धी+ आख्या तद्विदः पृथक् (कृताः)।१६।
त्यक्त+त्रि+देह+संगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् स्थितिः (तदेव) परात्परं निराकृति सत्+चित्+शर्म वस्तु (अस्ति)।१७।

पंचकोशांचे निरूपण चाललेले असता देहाचा अन्वय-व्यतिरेक यांचा विचार असंगत वाटण्याचे कारण नाही. स्थूलदेह हाच अन्नमय कोश आहे; सूक्ष्मदेहात प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय कोश अंतर्भूत आहेत. कारणदेहच प्रिय-मोद-प्रमोद या वृत्तींसहित आनंदमय कोश आहे. प्रिय म्हणजे इष्ट वस्तूचे दर्शन, मोद म्हणजे त्याचा लाभ आणि प्रमोद त्याची अनुभूती अशा ह्या आनंदमय कोशातील वृत्ती आहेत. इथे एकाच लिंग(सूक्ष्म)देहात तीन कोश (प्राण, मन आणि विज्ञान) गुण आणि अवस्था यांच्या भेदाने होतात. राजस कर्मेंद्रिये आणि प्राण यांच्यापासून प्राणमय कोश; ज्ञानेंद्रिये, मन आणि बुद्धी हे तीनही सत्त्वगुणात्मकच असले तरी बाह्य आणि अंतर अवस्थांमुळे दोन कोश होतात. बहिर्मुख इंद्रिये आणि मन यांचा मनोमय कोश आणि अंतर्मुख इंद्रिये आणि बुद्धी यांचा विज्ञानमय कोश. समाधीच्या अवस्थेत सुषुप्तीचेही भान नसते. जागृती आणि स्वप्न या अवस्थांची स्थूल आणि सूक्ष्म देहांसह जाणीव हरपलेली असते. पण समाधीच्या साक्षित्वाने आत्म्याचा अन्वय मात्र इतर अवस्थांसारखाच तिथेही असतोच.१६. अशा रीतीने अन्वय आणि व्यतिरेकाच्या माध्यमांतून पंचकोशांचा विवेक केल्याने स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही देहांचा अभिमान, संग किंवा लाग टाकून जी कल्पनारहित सुषुप्तीसारखी (सुषुप्ती नव्हे) स्थिती हेच श्रेष्ठतम, निराकार, सच्चिदानंद परब्रह्म आहे. 'हा आत्माच ब्रह्म आहे' हे श्रुतिवचन (मांडूक्य उ. २) यालाच अनुलक्षून आहे.१७. बीजात लीन झालेला वृक्ष जसा भूमी, पाणी आणि ऋतू यांमुळे अंकुरतो व दृश्यमान होतो, त्याचप्रमाणे सुषुप्ती अवस्थेतील अज्ञानात लीन झालेले जगत् आणि देह अज्ञानी जीवाला जागृत अवस्थेत पुनश्च प्रकटून अनुभवाला येतात.

**क्ष्माप्कालैर्बीजलीनद्रुर् यथेक्ष्यो जागृतेस्तथा । सुप्त्यवित्स्थजगद्देहौ तत्परत्वाविदः पुनः ।।१८।।**
**देहान्ते ज्ञस्याहंतास्थ-विश्वाकारोऽनुजन्मदः । अवस्था जागृतिः स्वप्नो निद्रा तुर्या च तुष्टये ।।१९।।**

बीज+लीन+द्रुः क्ष्म+अप्+कालैः यथा ईक्ष्यो (भवति) तथा सुप्ति+अवित्+स्थ+जगत्+देहौ तत्परत्व+अविदः जागृतेः पुनः (ईक्ष्यौ भवतः)।१८। अज्ञस्य देहान्ते अहंता+स्थ+विश्व+आकारः अनुजन्मदः (भवति)। जागृति, स्वप्न, निद्रा, तुर्या च तुष्ट्य अवस्था (ज्ञेयाः)।१९।

सुषुप्ती अवस्थेतील अज्ञान हाच कारणदेह आहे आणि जागृत अवस्थेतील देह आणि जग यांचे तेच बीज आहे असा भावार्थ.१८. जगाचा पसारा स्थूलदेहासहित अज्ञानरूपी बीजात - कारणदेहात लीन होणे आणि झोपेची स्थिती संपल्यावर तो पुनश्च प्रकटणे या दैनंदिन क्रिया आहेत. देहांताच्या वेळी केवळ स्थूल देहाचा नाश होतो. मात्र त्याचा **विश्व** नावाचा अभिमानी तसाच राहतो. त्यात हा विश्वाकार किंवा जगादाकार असतो. झाडाची फांदी तोडल्यावर जसे तिथेच पुन्हा नवी फांदी फुटावी तसा या विश्वाकारापासून नवा जन्म येतो. हा अहंकार केवळ ज्ञानानेच जात असल्याने ज्ञानाभ्यास हा एकच मोक्षाचा उपाय आहे. त्यानेच या चारही देहांचा प्रविलाप म्हणजे पूर्ण लय होतो. त्यासाठी या देहचतुष्टयाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. ते पुढील तालिकेत दिले आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण या देहांचे क्रमशः विषय, स्वप्न, निद्रा आणि समाधिज हे आनंद आहेत.१९. नेत्र, कंठ, हृदय आणि मस्तक ही स्थाने आहेत. विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यक् हे अभिमानी आहेत. स्थूल, सूक्ष्म (प्रविवित्त), मुद आणि उन्मुद (परानंद) हे भोग आहेत.२०. रज, सत्त्व, तम आणि शुद्धसत्त्व हे गुण आहेत. वैखरी, मध्यमा, पश्यन्ती आणि परा या वाचा आहेत.२१. तीन अवस्थात त्याच क्रमाने ॐकाराच्या तीन मात्रा (अ, उ, म) आहेत आणि तुर्यावस्थेत (महाकारण देहात) अर्धमात्रा आहे.

**विश्वतेजःप्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिताः । दृक्कण्ठहृन्मूर्धसंस्थाः स्थूलसूक्ष्ममुदुन्मुदः ।।२०।।**
**भोगा रजःसत्त्वतमः-शुद्धसत्त्वगुणाः क्रमा । वाचोऽत्र वैखरी मध्या पश्यन्ती च परास्त्रिषु ।।२१।।**
**त्रिमात्रा ॐकृतेस्त्वर्धा तुर्ये ज्ञात्वैवमादितः ।**

दृक्+कंठ+हृत्+मूर्ध+संस्थाः विश्व+तेजः+प्राज्ञ+प्रत्यक्+अभिमानिनः ईरिताः। स्थूल+सूक्ष्म+मुद्+उन्मुदः (क्रमेण एषां) ईरिताः।२०। रजः+सत्त्व+तमः शुद्धसत्त्वगुणाः क्रमात् गुणा (ज्ञेयाः) अत्र क्रमात् वैखरी+मध्या+पश्यंती परा च वाचो (ज्ञेयाः)।२१। त्रिषु त्रिमात्रा ॐकृतेः+तु+अर्धा तुर्ये।

## चार देह, त्यांच्या अवस्था, अभिमानी, स्थान इत्यादींची तालिका

| देह | अवस्था | अभिमानी | स्थान | आनंद | भोग | गुण | वाचा | देव | लोक | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थूल | जागृत | विश्व | नेत्र | विषयानंद | स्थूल | रज | वैखरी | ब्रह्मा | भूः | अः |
| सूक्ष्म | स्वप्न | तैजस | कंठ | स्वप्नानंद | प्रविवित्त | सत्त्व | मध्यमा | विष्णु | भुवः | उः |
| कारण | निद्रा | प्राज्ञ | हृदय | निद्रानंद | आनंद | तम | पश्यंती | रुद्र | स्वः | मः |
| महाकारण | तुर्या | प्रत्यक् | मूर्धा | समाध्यानंद | परानंद | शुद्धसत्त्व | परा | आत्मा | महः | अर्धमात्रा |

हे सर्व सविस्तर जाणून घेऊन प्रथम स्थूल देहाचा सूक्ष्म देहात लय करावा. त्या सूक्ष्म देहाचा लय कारणदेहात करावा. त्याचा लय महाकारण देहात केल्यावरच आनंदरूप होऊन स्वरूपात स्थिरावतो. दुसरा कांहीच उपाय नाही. **लय** म्हणजे त्या त्या देहाची आत्यंतिक विस्मृती. सामान्य माणूसही एखाद्या क्रियेत गढून गेला की त्याला देहाची विस्मृती होते; कधी कधी तहान-भूकही हरपतात. संगीताच्या प्रभावाने शरीराचे व मनाचेही दुःख माणूस विसरतो. हेच ज्ञानाभ्यासाच्या वा योगाभ्यासाच्या प्रक्रियेने साधता आले पाहिजे.२२.

**स्थूलः सूक्ष्मे कारणे तत् तन्महाकारणे क्रमात् । प्रविलाप्यानन्दमयः स्वस्थो भवति नान्यथा ।।२२।।**
**तस्माद्देहत्रये लीने धीलयः स समाधिकः । तत्ते परात्परं रूपं निर्विकल्पमवेहि सत् ।।२३।।**
**घटादिवद्द्योर्जीवस्याविद्योपाधिस्तु तत्क्षये । खस्थद्योवत्परात्मत्वं जीवत्वं लीयतेऽचिरात् ।।२४।।**
**ज्ञाते क्षराक्षराहंता-परे तत्त्वे स तन्मयः । सृष्टेः प्राङ्निर्विकल्पैका चिद्ब्रह्मास्मीत्यभूत्त्विह ।।२५।।**

एवं आदितः ज्ञात्वा स्थूलः सूक्ष्मे तत् कारणे तत् महाकारणे क्रमात् प्रविलाप्य आनंदमयः स्वस्थो भवति अन्यथा न।२२। तस्मात् देह+त्रये लीने धी+लयः सः समाधिकः। तत् ते परात् परं सत् निर्विकल्पं रूपं अवेहि।२३। द्योः घट+आदि+वत् जीवस्य तु अविद्या उपाधिः तत्+क्षये ख+स्थ+द्यो+वत् परात्मत्वं (भवति)। जीवत्वं अचिरात् लीयते।२४। क्षर+अक्षर+अहंता+परे तत्त्वे ज्ञाते स तन्मयः (भवति)। सृष्टेः प्राक् एका निर्विकल्पा चित् (आसीत्) इह तु ब्रह्म+अस्मि+इति स्फूर्तिः अभूत्।२५।

अशा रीतीने तीनही देहांचा लय केल्याने प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्त्याकार बुद्धीचाही लय होतो. तीच समाधी होय. तेच तुझे परात्पर, निर्विकल्प सत् रूप आहे हे जाण.२३. आकाशाच्या जशा घट आदि उपाधी आहेत तशीच जीवाची अविद्या ही उपाधी आहे. घटाचा नाश होताच त्याने सीमित झालेले आकाश जसे महाकाशच होऊन जाते तसेच अविद्येची उपाधी नष्ट झाली की जीवदशा संपते आणि मूळचा परमात्मभाव प्राप्त होतो.२४. क्षर म्हणजे सर्व भूतमात्र, अक्षर म्हणजे कूटस्थ (आत्मा) आणि अहंता म्हणजे त्रिदेहरूपी संघाचा अभिमान. या तीन्हींच्या पलीकडले तत्त्व जाणणारा..

**स्फूर्तिः खे वायुवत्साद्या मायाद्यस्तज्ज्ञ ईश्वरः । तत्र विश्वोद्गमेहाभूत्साऽन्या मायाथ तत्र तु ।।२६।।**
**जगत्स्यामिति सङ्कल्पोऽभून्महत्तत्त्वनामकः । विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेशजीवकौ ।२७।।**
**जीवोऽविद्याऽऽवृतः स्वाज्ञो महतोऽहंकृतिस्त्रिधा । क्रियाज्ञानद्रव्यशक्ति-रजःसत्त्वतमोगुणैः ।।२८।।**
**प्राणेन्द्रियान्तःकरण-भूतान्यासन्क्रमात्ततः । ततो लोका विराट् तैश्चिदंशात् कार्यक्षमोऽभवत् ।।२९।।**
**लोकाङ्गस्य रदास्तारा माया हास्यं निशादिने । निमेषोन्मेषौ कटाक्षः सृष्टिः कुक्षिरपांपतिः ।।३०।।**

खे वायुवत् स्फूर्तिः सा आद्या माया तज्ज्ञ ईश्वरः। तत्र विश्व+उद्गम+इहा अभूत् सा अन्या माया अथ तु तत्र जगत्+स्याम्+इति संकल्पो महत्+तत्त्व+नामकः अभूत्। विद्या+अविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेश जीवकौ (ज्ञाते)।२६-२७। अविद्या+आवृतः स्व+अज्ञः जीवः महतः+अहंकृतिः त्रिधा। रजः+सत्त्व+तमो+गुणैः क्रिया+ज्ञान+द्रव्य+शक्तिः (अभूत्)।२८। ततः क्रमात् प्राण+इन्द्रिय+अन्तः करण-भूतानि आसन्। ततः लोकाः (आसन्) विराट् चित्+अंशात् तैः कार्यक्षमः+अभवत्।२९। लोक+अंगस्य तारा रदाः माया हास्यं निशा+दिने निमेष+उन्मेषौ कटाक्षः सृष्टिः अपां पतिः कुक्षिः।३०।

..त्या तत्त्वाशी एकरूप होतो. ते स्पष्ट करण्यासाठी उपक्रम आणि उपसंहार यांचे वर्णन केले आहे.

**उपक्रम -** सृष्टीच्या पूर्वी कल्पनारहित, एकच एक असे चैतन्य होते. शांत निश्चल आकाशात एखादी वायूची लहर उठावी तशा त्या ब्रह्मात 'मी ब्रह्म आहे' अशी वृत्ती निर्माण झाली.२५.

ही जी हवेच्या लहरीसारखी स्फूर्ती झाली तिलाच **आदिमाया** म्हणतात. तिचा ज्ञाता ईश्वर आहे. ह्या सर्वज्ञ, सर्वकर्तृत्ववान् ईश्वराला विश्वाची निर्मिती करावी अशी इच्छा झाली. ही दुसरी माया होय. ही मलिनसत्त्वोपाधिक **अविद्या माया**. तिच्या ठायी 'जगत् व्हावे' असा जो संकल्प झाला त्यालाच **महत् तत्त्व** असे नाव आहे. विद्या माया आणि तिचा ज्ञाता - तिच्यांत प्रतिबिंबित झालेले चैतन्य, हा **सर्वेश्वर**. दुसरी मलिनसत्त्वोपाधिक अविद्या माया आणि

**नाड्यो नद्यो द्रुमाः केशा वृष्टी रेतोऽस्थि पर्वतः । विराजः स्थूलदेहोऽयं चराचरजगन्मयः ।।३१।।**
**दिग्वाय्वर्कप्रचेतोऽश्वि-वह्नीन्द्रोपेन्द्रमृत्युकाः । ज्ञानकर्मेन्द्रियाण्यन्तःकरणानि हरिः शशी ।।३२।।**

नद्यो नाड्यः, द्रुमाः केशाः, वृष्टिः रेतः, पर्वतः अस्थि, (एवं) चराचर+जगत्+मयः अयं विराजः स्थूलदेहः (ज्ञेयः)।३१। दिक्+वायु+अर्क+प्रचेतः+अश्वि+वह्नि+इन्द्र+उपेन्द्र+मृत्यकाः ज्ञान+कर्म+इन्द्रियाणि (बोध्यानि)। हरिः शशी ब्रह्म+नारायण+ईशाः च अन्तःकरणानि। (एवमयं) विराजः सूक्ष्मदेहः।३२।

तिच्यांत प्रतिबिंबित होणारा तिचा ज्ञाता जीव. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, स्वतंत्र, विभू आहे तर जीव अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, परतंत्र आणि परिच्छिन्न आहे.२६-२७. अविद्येने आवृत (झाकलेला) हा जीव स्वतःला जाणत नाही. आदि जीव म्हणजेच ब्रह्मा किंवा हिरण्यगर्भ होय. हा समष्टीचा सूक्ष्म देह आहे. महत्तत्त्वापासून त्रिविध अहंकार झाले. रजोगुणात्मक क्रियाशक्ती, सत्त्वगुणात्मक ज्ञानशक्ती आणि तमोगुणात्मक वस्तुशक्ती असे ते तीन अहंकार होत.२८. राजस अहंकारापासून कर्मेंद्रिये आणि प्राण झाले. सात्त्विक अहंकारापासून पाच ज्ञानेंद्रिये, अंतःकरणपंचक आणि त्यांच्या देवता झाल्या. तामस अहंकारापासून पृथिवी, आप इत्यादि पंच महाभूते झाली. त्या भूतांपासून चतुर्दश भुवने (लोक) झाले. ते असे भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक (स्वर्ग), महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे वरचे सात लोक आणि अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हे सप्तपाताल लोक झाले. त्या लोकांपासून विराट् पुरुष प्रकट झाला. त्या विराटांत चैतन्याचा अंश (चिदंश) प्रवेशल्याने तो कार्यक्षम झाला. हा विराट् समष्टी स्थूलदेह आहे.२९.

**विराट् -** हे चौदा लोकच ज्याचे अवयव आहेत अशा त्या विराटाचे नक्षत्र हे दात आहेत, माया हास्य आहे, रात्र आणि दिवस निमेषोन्मेष आहेत, त्याच्या कटाक्षाने सृष्टी होते, सागर हा त्याची कूस आहे.३०.

**ब्रह्मनारायणेशाश्च सूक्ष्मदेहोऽथ कारणम् । अविद्याऽद्या महत्प्रत्यगीशो देहनिरासतः ।**
**तत्पदं व्यतिरेकात्त्वं-पदं तत्त्वमसि ह्यतः ।।३३।।**
**भूरप्स्वग्नौ ताः स वायौ स खे तत्प्रविलापयेत् । द्रव्ये तमसि तत्सत्त्वे रजः सत्त्वं तमस्यथ ।।३४।।**
**अहंकृतौ तन्महति साविद्यायां लयो द्वयोः । साद्यायां सा ब्रह्मणीत्थं त्वंपदं व्यतिरेकतः ।।३५।।**

अथ अविद्या कारणं, आद्या महत्कारणं, ईशः (एव) प्रत्यक्, व्यतिरेकात् देह+निरासतः त्वपदं (इव) तत्पदं, अतः हि तत् त्वम् असि।३३। भूः अप्सु, ताः अग्नौ, स वायौ, स खे, प्रविलापयेत्। तत् द्रव्ये तमसि, तत् (तमः) रजः सत्त्वे, सत्त्वं तमसि, तत् (तमः) अहंकृतौ, (सा) महति, (स) (महान्) अविद्यायां, द्वयोः (अपि) लयः, सा आद्यायां, सा ब्रह्मणि, इत्थं व्यतिरेकतः त्वं पदं (बोध्यम्)।३४-३५।

नद्या त्या विराटाच्या नाड्या आहेत, वृक्ष त्याचे केस आहेत, वृष्टी रेत आहे, पर्वत अस्थी आहेत. असा हा चराचर जगत्स्वरूप विराट् ह्याला (समष्टीचा) स्थूलदेह जाणावा.३१.

**हिरण्यगर्भ -** दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इन्द्र, उपेन्द्र आणि यम ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. (क्रमशः कान, त्वचा, नेत्र, रसना, नासिका, वाणी, हात, पाय, गुद आहेत. प्रजापती ज्याचे उपस्थ आहे.) समष्टीची इंद्रिये ही व्यष्टीच्या (जीवाच्या) इंद्रियांच्या देवता आहेत. जीवाच्या इंद्रियांची कार्यक्षमता ही समष्टीच्या इंद्रियरूप देवतांच्या अनुग्रहावर अवलंबून आहे. हरी त्याचे अंतःकरण आहे तर चंद्र मन आहे.३२. ब्रह्मदेव त्याची बुद्धी आहे आणि रुद्र अहंकार आहे. हा विराट पुरुषाचा (समष्टीचा) सूक्ष्म देह होय. यालाच हिरण्यगर्भ किंवा सूत्रात्मा असेही म्हणतात. अविद्या हा समष्टीचा कारण देह आहे तर आदिमाया (विद्यामाया) महाकारण देह आहे. ईश्वर हा समष्टीचा प्रत्यगात्मा आहे. वर ज्याप्रमाणे जीवाच्या तीन देहांचा निरास किंवा लय करून त्याचे प्रत्यक् स्वरूप सिद्ध केले, त्याच प्रकारे समष्टीच्या तीन देहांचा (विराट, हिरण्यगर्भ आणि अविद्या माया) लय केला की जीवाचे ईश्वराशी

**व्याख्यारूपैकसद्वस्तु सृष्टेः प्राक् चाधुनापि तत् । त्वं श्रोत्रात्मेन्द्रियातीतमस्यैक्यमनुभूयताम् ।।३६।।**
**सृष्टेः प्राक् सच्चिदानन्द-रूपोऽद्याहङ्कृतेर्लयात् । प्राग्वदूर्ध्वमपीदृक्त्वं या सृष्ट्यस्तित्वकल्पना ।।३७।।**
**गवाधाराहङ्कृतेः प्राक्-स्थानाभावान्न साद्य चेत् । तद्वत्क्वास्ति त्वमेकोऽतोऽद्वितीयो ब्रह्म चिन्मयः ।।३८।।**

व्याख्या+रूप+एकसत्+वस्तु (यत्) सृष्टेः प्राक्+अधुना+अपि तत्। श्रोत्र+आत्म+इन्द्रिय+अतीतं त्वं असि। ऐक्यं अनुभूयताम्।३६। सृष्टेः प्राक् त्वं सच्चिदानन्दरूपः (आसीः)। अद्य अहंकृतेः लयात् प्राक् वत् सच्चिदानंदरूपः (असि)। ऊर्ध्वं अपि ईदृक (भविष्यसि)। अहंकृतेः प्राक् या सष्टि+अस्तित्व+कल्पना सा गो+आधारा अद्य न। चेत् तद्वत् क्व अस्ति? अतः त्वं एकः अद्वितीयः चिन्मयः ब्रह्म (असि)।३७-३८।

ऐक्य सिद्ध होते. 'तो तू आहेस' या महावाक्यातील 'तू' या पदाने (*त्वंपदाने*) लक्षिलेल्या जीवाची, 'तो' या पदाने *(तत्पद)* दर्शविलेल्या ईश्वराशी एकरूपता आहे हा निश्चय होतो.३३.

**उपसंहार -** आता हा निरास कसा करायचा ते सांगत आहेत. पृथ्वीचा लय जलात करायचा; त्या जलाचा लय तेजात (अग्नीत) करायचा; तो अग्नी वायूत विलीन करायचा; आणि वायूचा आकाशात लय करायचा. ते आकाश द्रव्यात्मक तमोगुणात विलीन करायचे. मग तमोगुणाचा (अहंकारातील) रजोगुणात, रजोगुणाचा (अहंकारातील) सत्त्वगुणात आणि सत्त्वगुणाचा (अहंकारातील) तमोगुणात लय करावा.३४. तो तमोगुण अहंकारात लीन करून अहंकाराचा लय अविद्यामायेत करावा. अशा रीतीने विराजाच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांचे प्रविलापन होते. मग अविद्यामायेचा लय आदिमायेत आणि तिचा लय ब्रह्मात करावा. अशा रीतीने सर्व विलापांची सीमा जे ब्रह्म तेच उरते. ते व 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ आहे. याच प्रकारने देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी यांचा विलय करून उरलेला जो प्रत्यगात्मा तोच 'त्वं' पदाने लक्षिलेला आहे.३५.

**ब्रह्मबुद्ध्या द्वयाभावाद् देह्यहंकृतिसंक्षयात् । शिष्यतेऽत्र निराकारः क्वाख्यारूपात्मकं जगत् ।।३९।।**
**स्रग्भोगिवद्दृष्टमपि ज्ञानदीपान्न ते भ्रमः । ज्ञानं त्यक्त्वा दृढाभ्यासी भ्रमेणापि न युज्यते ।।४०।।**

ब्रह्म+बुद्ध्या अहंकृति+संक्षयात् द्वय+अभावात् अत्र देही निराकारः शिष्यते। आख्या+रूपात्मकं जगत् क्व?।३९। स्त्रक्+भोगि+वत् दृष्टं अपि (जगत्) ज्ञान+दीपात् ते भ्रमः न। दृढ+अभ्यासी ज्ञानं त्यक्त्वा अपि भ्रमेण न युज्यते।४०।

**तत्त्वमसि -** या दोहोंचे ऐक्य दाखविण्यासाठी महावाक्याचे आता निरूपण करीत आहे. नाम आणि रूप यांच्या पलीकडील एकमेवाद्वितीय (सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदांनी रहित) जी वस्तू सृष्टीच्या पूर्वीही होती, आज स्थितीच्या काळातही आहे आणि प्रलयानंतरही राहणारच आहे.

छांदोग्यात (*वाचारंभणं विकारो नामधेयम्।* ६:१:४)) सोन्याच्या विविध अलंकारांची नावे जरी वेगळी असली तरी त्यातील सोन्यात कांहीच फरक नसतो, या दृष्टांताने संपूर्ण चराचर जगत हे एकाच ब्रह्माचे विकारभूत आहेत. त्याची नावे जरी वेगवेगळी असली तरी ती बोलण्यासाठी आहेत. ब्रह्मस्वरूपात कांही फरक पडत नाही. तसेच बृहदारण्यक उपनिषदांत (३:४:२) 'याच्याशिवाय इतर सर्व दुःखमूलक- नाशिवंत आहे.' असे म्हटले आहे. ह्या श्रुती याच ब्रह्मवस्तूचा निर्देश करतात. हेच 'तत्'पदाचे लक्ष्य आहे. हे ऐकणारा जो तू आहेस त्याचा देह, इंद्रिये, मन, बुद्धी आदींच्या संघाताच्या पलीकडचा आहेस. त्यांच्या प्रविलापनाने उरलेले जे प्रत्यक्, साक्षी चैतन्य आहे तेच 'त्वं'पदाचे लक्ष्य आहे. या महावाक्यांत या दोन्ही पदांची 'असि' या पदाने समानता प्रतिपादली आहे. याच्या अखंडत्वाने हे दोन्ही - जीव आणि परब्रह्म, 'तेच तू' आणि 'तूच ते' अशी एकरस एकरूपता तुला निदिध्यासनादि क्रमांनी अपरोक्षतया (प्रत्यक्ष) अनुभवायची आहे.३६. सृष्टीच्या पूर्वी तू सच्चिदानंदस्वरूप होतास. आता अहंकाराचा लय झाल्यावर आणि तुझ्या सर्व उपाधी गळून पडल्यावर तू पूर्वीसारखाच सच्चिदानंदरूप आहेस. यानंतरही - विदेह कैवल्यानंतरही असाच सच्चिदानंदरूप राहणार आहेस. अर्थात् तू एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहेस. शिष्याच्या मनांत

**सज्यह्यभावः प्रागूर्ध्वं तद्वद् ब्रह्मणि चास्य तु । अभावाच्छून्यता मैहि तज्ज्ञ सच्चित्सुखात्मक ।।४१।।**
**भास्वान्नित्यः प्रबोधोऽयं वेदा भ्रान्तहितैषिणः । साधकान्यद्य कार्याणि साध्याभावान्न कुर्वतः ।।४२।।**

यथा स्रजि अहि+अभावः तद्वत् प्राक् ऊर्ध्व च ब्रह्मणि अस्य तु (अभावः) तत्+ज्ञ सच्चित्सुखात्मक अभावात् शून्यता मा एहि।४१।
अयं प्रबोधः भास्वान् नित्यः (अस्ति)। वेदाः भ्रान्त+हितैषिणः (सन्ति) अतः साधकानि कार्याणि। अद्य साध्य+अभावात् न कुरु।४२।

अशी शंका आहे की, 'ही माझ्याहून वेगळी अशी सृष्टी मला प्रत्यक्ष दिसते आहे, अनुभवाला येते आहे तर मग मी अद्वितीय कसा असेन?' गुरुमहाराज सांगत आहेत, 'पूर्वी इंद्रियादींच्याविषयी अध्यासाने जो अहंकार होता त्याच्या आधाराने सृष्टीच्या अस्तित्वाची कल्पना होती. पण आता तुला ज्ञान झाले असल्याने तुला सर्व कांही इंद्रियादिक आत्ममयच झाले आहे. त्या सृष्टीच्या अस्तित्वाच्या कल्पनेला आता आधारच राहिला नाही. बृहदारण्यक उपनिषदांत (४:५:१५) सांगितल्याप्रमाणे सर्व कांही एकरूपच झाले आहे. मग कोण कुणाला पाहील, कोण कुणाला जाणील?'३७. आता पूर्वीसारखी सृष्टी शोधूनही सापडणार नाही. अंधारात भासलेला साप, दिवा आणून पाहिल्यावर, आणि ती दोरी असल्याचे जाणल्यावर, पुन्हा हुडकूनही सांपडणार नाही. तो ना कधी होता, ना आता आहे, ना पुढे कधी असेल.३८. बुद्धीची वृत्ती अखंडतया ब्रह्माकार झाली की निराकार स्वरूपच उरते. तिथे नामरूपात्मक जगत् कुठे असणार?३९. भोगकाळामध्ये कदाचित् कधी माळेवर भासणाऱ्या सापासारखा जगाचा भास जरी तुला झालाच तरी आता ज्ञानदीप तेवत असल्याने तो भ्रम टिकणार नाही. 'मग हा ज्ञानदीप किती काळपर्यंत राखून ठेवायचा' असे विचारशील तर 'अभ्यास दृढ होईपर्यंत' हे त्याचे उत्तर आहे. एकदा अभ्यास दृढ झाला की मग ज्ञान आवर्जून सांभाळावे लागत नाही. पण त्यासाठी स्वप्नातही 'मी ब्रह्म आहे' ही भावना स्थिर राहिली पाहिजे.४०.

**भगवत्वाक्यतोऽसक्तः कुरु वा तैर्न लिप्यसे । मनो विनापि ज्ञातासि ध्यानादेः किं प्रयोजनम् ।।४३।।**

वा भगवत्+वाक्यतः असक्तः (सन्) कुरु तैर्न लिपसे। (त्वं) मनोविना अपि ज्ञाता असि (अतः) ध्यान+आदेः किं प्रयोजनम्।४३।

**ज्ञानी पुरुषाने कर्म करावे का?** जसा माळेत सापाचा अभाव तीनही काळात आहे, तसाच ब्रह्मात भ्रमाच्या पूर्वी आणि ज्ञानाच्या नंतरही आहेच. पण अभावालाच मोक्ष मानून शून्यतेचा अंगीकार करू नकोस. कारण त्या अभावाला जाणणारा सच्चिदानंदस्वरूप असा तू आहेसच.४१. तुला हा जो प्रकाशरूप बोध झाला आहे तो आजच झाला असे नाही. हा नित्यच आहे. कधीही नष्ट न होणारा आहे. 'हा जर नित्यच आहे तर वेद ह्या बोधाच्या प्राप्तीसाठी का उपदेश करतात?' या शिष्याच्या प्रश्नाला उत्तर आहे की, भ्रान्तीने देहालाच आपले स्वरूप मानणाऱ्या कल्याणकामी लोकांसाठी वेदांचा उपदेश आहे. तो मुक्तासांठी नाही. ज्यांना आत्मज्ञान हे साध्य आहे अशा साधकांनी वेदांनी उपदेशिलेली साधने करावीत. आत्मज्ञान झाल्यावर त्याची आवश्यकता राहत नाही. तेव्हा आता तू कांहीही साधन करूं नकोस. भ.गीतेत (३:१८) हेच सांगितले आहे. '*नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।*' त्याला कांही करण्याने वा न करण्याने कांहीच कमवायचे वा गमवायचे नसते.४२. किंवा तिथेच पुढे २५ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे लोकसंग्रह करण्यासाठी, लोकांना धडा घालून देण्यासाठी निरासक्त बुद्धीने कर्मे करावीत. आसक्ती आणि अहंकाराचा तुझ्या ठिकाणी अभाव असल्याने तू त्या कर्मांनी लिप्त होणार नाहीस. 'मग निदिध्यासनादि करावे कां?' या शिष्याच्या प्रश्नाला अपक्षून सांगितले आहे की त्याचीही आवश्यकता नाही. तुला देहाच्या ठिकाणी विपर्यस्त अहंभावना नसल्याने आणि तू मनाशिवायच स्वरूपाला जाणत असल्याने ध्यानादींचे काय प्रयोजन? पंचदशीत (तृप्तिदीप २६१) विपर्यस्ताला ध्यानाची आवश्यकता आहे अविपर्यस्ताला नाही असे प्रतिपादन आहे.४३. '*तस्य तावदेव चिरं*' (छांदोग्य उपनिषद ६:१४:२) या श्रुतीनुसार जोवर प्रारब्ध आहे तोवर हा पंचकोशात्मक देह राहील. मात्र, वर्ण, आश्रम, संबंध इत्यादि देहाचे धर्म, भूक, तहान इत्यादि प्राणाचे धर्म तसेच शोकमोहादि मनाचे धर्म, यांचा आता तुझ्याशी कांहीच संबंध नाही.

**अदेहप्राणहृद्धर्मः प्रारब्धाशीः सुखं वस । इदं रहस्यं बोधाख्यं तज्ज्ञो ब्रह्ममयो भवेत् ।।४४।।**

**इति बोधाख्यं द्वितीयं रहस्यम् ।।**

**समाप्तोऽयं ग्रन्थः प्रीयतामनेन श्रीदत्तः ।।**

**इति श्रीमत्परमहंस परिव्रजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती (टेम्बे) स्वामिविरचितं**

**श्रीगुरुचरितं सम्पूर्णम् ।।**

अ+देह+प्राण+हृत्+धर्मः (सन्) प्रारब्ध+आशीः सुखं वस। इदं बोधाख्यं (अति) रहस्यं तत्+ज्ञः ब्रह्म+मयः भवेत्।४४।

आता तू केवळ साक्षित्वाने प्रारब्धाचा वाहक बनून राहा. (पुढील अर्धश्लोक ग्रन्थालंकार आहे) हे 'बोध' नावाचे रहस्य आहे. रहस्य म्हणजे वेदांचा गोपनीय भाग जो अधिकारी श्रोत्यांच्याच (वाचकांच्या, ग्राहकांच्या) पदरी पडतो. हे रहस्य जाणणारा ब्रह्मरूप होतो. कठोपनिषदाच्या (२:३:८) प्रतिपादनानुसार 'जे जाणल्याने जीव बंधनांतून मुक्त होऊन अमृतत्व पावतात' तेच हे रहस्य होय.४४.

**इति द्वितीयं रहस्यं । संपूर्णोऽयं टीकाग्रंथः । प्रीयतामनेन सर्वान्तर्यामी भगवान्श्रीदत्तसद्‌गुरुः ।।**

**ज्ञानं त्रयोदाध्यायैः कर्मयोगं च पंचभिः । पंचभिर्भक्तियोगं च कारयामास योगिराट् ।।१।।**

**पाचात्यपाथोधितटे नवानां टीका प्रभासेऽभ्युदिताऽखिलानाम् ।**

**श्रीद्वारकायां चरितस्य तस्य श्रीसद्‌गुरोर्वेदनुतस्य तस्य ।।२।।**

**शालिवाहनाके क्ष्माश्विवसुभूमिमिते (१८२१) त्वियं ।**

**टीका संपूर्णतां प्राप्ता चातुर्मास्ये ह्यवर्षके ।।३।। ।। संवत् १९५६ ।।**

हा टीकाग्रंथ इथे संपूर्ण झाला. याने सर्वान्तर्यामी भगवान श्रीदत्तसद्गुरू प्रसन्न होवोत. तेरा अध्यायात ज्ञानयोग, नंतरच्या पाच अध्यायात कर्मयोग आणि शेवटच्या पाच अध्यायात भक्तियोग यांचे निरूपण योगिराज दत्तात्रेयांनीच करविले. त्या वेदवंद्य सद्गुरूंच्या चरित्रावरील नऊ अध्यायांवरची टीका पश्चिम समुद्राच्या तीरावर प्रभास क्षेत्री (ग्रंथ जवळ नसतांनाही) संपन्न झाली. शेष सर्व ग्रंथ श्रीक्षेत्र द्वारकेच्या चातुर्मासात शालिवाहन शकाच्या १८२१व्या वर्षी अवर्षणात पूर्ण झाला. संवत् १९५६.

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचित श्रीगुरुचरितं (द्विसाहस्री) या ग्रंथातील बोधरहस्य इथे पूर्ण झाले.**

**ते श्रीगुरुचरणी समर्पित असो.**